'हदिवरदा' या ग्रंथाचे कर्ते श्रीनाथभक्त कवि कृष्णदयार्णवकृत

# श्री एकनाथ स्तुतिपर नमन

अधिष्ठान जेथें प्रतिष्ठान देखा । तिथें जन्मला तो गुणातीत एका॥
जयाचेनि नामें चुके जन्म व्यथा । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥१॥

नदी दिव्य गोदातटीचा निवासी । सदा प्रिय जो सज्जना वैष्णवांसी॥
जया वर्णितां प्रेम आल्हाद चित्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥२॥

स्वये भानु जो भानु आराधियेला । तयाचे कुळीं दिपकु दिव्य झाला॥
हरीभक्तिलागोनि तारी समस्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥३॥

चरित्रे विचित्रे पवित्रे अपारे । मुढे पामरे तारिले सूविचारे॥
जयाचे कृपेनें समाधान चित्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥४॥

लिलाविग्रही सर्वही निर्मियेले । जिवी जीवना साधना योग्य केले॥
अनन्यमुक्ति जो भक्ति जो मुक्तिदाता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥५॥

जयाची जगी कीर्ति विस्तारिलीसे । जयाचेनि नामें महादुःख नासे।
जयाचेनि योगे घडे सर्व सत्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥६॥

जेणे अर्चिले द्विज देवासी नेमे । जेणें तारिले विश्व हें रामनामें।
सदा सेवी जो सद्गुरू मोक्षदाता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥७॥

जया नांव ना रूप ना गुण कांही । जया देह ना विदेहता भास नाहीं॥
बहू तारिले हस्त ठेवूनि माथा । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥८॥

जगीं एकला सद्गुरू एकनाथु । असे बोलती सर्वही विश्वमातु॥
जया ऊपमाही नये एक देता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥९॥

कवी नायकु दायकु सौख्य राशी । महा ज्ञानसिंधू असे नाम ज्यासी॥
जयाची जगीं वर्णितं कीर्ति गाता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥१०॥

अनंता गुणाचा नये वर्णिता हो । सदा दास तो शामवर्णी पहा हो॥
जयाचे मुखे नाम रूचे समस्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥११॥

महा संत साधु प्रतिष्ठानवासीं । स्मरा एकनाथा पदी मुक्तिराशी।
जयाचे गृहीं कृष्णजीं कार्यकर्ता । नमस्कार माझा सद्गुरू एकनाथा ॥१२॥

एकात्मता जाणुनि भाव एका । एकादशाची करी शुद्ध टीका।
जनार्दनाचें प्रिय पात्र पाहीं । त्या एकनाथाशीं स्मरतो सदाही ॥१३॥

# विषयानुक्रमणिका

टीप : मथळ्यापुढे असलेला आकडा पृष्ठसंख्येचा आहे.

## बालकांड

### अध्याय १ ते २७

श्रीरामांची जिज्ञासा-७४. तिचे सौंदर्यवर्णन, अहल्येसाठी इंद्रादिकांची स्पर्धा, ब्रह्मदेवाचा पण, गौतमांनी प्रसूतिसमयी गाईला प्रदक्षिणा करून पण जिंकला, त्यामुळे इंद्र कपटाचरणास प्रवृत्त, इंद्रापासून सावध राहाण्याची सूचना-७५. गौतमरूपाने इंद्राचे अहल्येकडे आगमन, कपटाचरण लक्षात आणल्यामुळे अहल्येचा संताप, गौतमाकडून अहल्या व इंद्रास शाप, अहल्येची प्रार्थना, शापवाणी-७६. गौतमाकडून उःशाप, शाप दिल्याबद्दल गौतमांना पश्चात्ताप, कामक्रोधाचा प्रभाव-७७. शापामुळे इंद्राची अवस्था, शापांचे परिणाम, इंद्राकडून गौतमस्तुती, इंद्राला उःशाप प्राप्ती, इंद्रशापामुळे मोर आणि हत्तीवर परिणाम-७८. अहल्येचा उद्धार, श्रीरामस्तुती, नाममाहात्म्य-७९. अहल्येने केलेली स्तुती, गौतम-अहल्या-पुनर्मीलन-८०.



**अध्याय पंधरावा**

## • सीतेचा पूर्वजन्म वृत्तांत •

श्रीरामचरणस्पर्शाचा परिणाम-८०. ऋषिमुनींचे मिथिला नगरीकडे प्रयाण, विदेहपुरीचे वर्णन, निसर्ग सौंदर्य स्वयंवर यज्ञमंडपावरील रूपक-८१. श्रीरामांनी यज्ञभूमीजवळ निवास केला, राजा जनकाकडून श्रीराम-लक्ष्मण वर्णन, विश्वामित्रांचे उत्तर, सीतेचा जन्मवृत्तांत-८२. शतानंदाकडून कथाकथन, नाममहिमा, पद्माक्षराजाचे अनुष्ठान, विष्णूकडून वरप्राप्ती, पद्मावती विवाह, भयंकर रणकंदनातून सर्वनाश-८३. पद्मावतीची अग्नीत उडी आणि बाहेर आगमन, तिला नेण्याचा रावणाचा प्रयत्न, पुन्हा अग्निप्रवेश, कुंडात पंचरत्नप्राप्ती, रत्नपेटी उघडताच तेजस्वी कन्यादर्शन, रत्नपेटी भूमीत पुरण्याविषयी मंदोदरीचा सल्ला-८४. पेटीतून प्रकटलेली भविष्यवाणी, जमीन नांगरताना ब्राह्मणाला पेटीची प्राप्ती, त्यावरील मालकीसंबंधी चर्चा, पेटीतील कन्येचा जनकाकडून स्वीकार-८५.



**अध्याय सोळावा**

## • परशुरामांचा प्रताप •

शिवधनुष्याचा पण करण्याचे कारण, रेणुकेची कथा, जमदग्नीच्या वधाचे कारण, रेणुकेच्या सांगण्यावरून सहस्रार्जुनाला मेजवानी-८६. जमदग्नीने क्रोधत्याग का केला? रेणुकेची संभ्रमावस्था, रेणुकेचा वध करण्याची जमदग्नीची आपल्या मुलाला आज्ञा, पित्राज्ञा-पालनामुळे परशुरामास वरदान-८७. जमदग्नीकडून क्रोधनिंदा, क्रोधाची दर्पोक्ती-८८. क्रोधाला जमदग्नीचे उत्तर, क्रोध स्वीकारण्याची परशुरामाची तयारी, क्रोधाची साधक-बाधकता, परशुरामाचा क्रोधाचा स्वीकार, सहस्रार्जुनाचे आतिथ्यवर्णन-८९. पाकसिद्धी कामधेनूमुळे झाली म्हणून तिचीच ऋषीजवळ मागणी, राजाची बळजबरी व जमदग्नीचा वध, रेणूकेकडून राजा मूर्च्छीत-९०. कामधेनूकडून राजाचा पराभव, कामधेनूचे स्वर्गाला प्रयाण, रेणुकेकडे परशुरामांचे आगमन, एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची परशुरामाला रेणुकेची आज्ञा, जमदग्नीची उत्तरक्रिया व रेणुकेचे सहगमन-९१. परशुरामाची सहस्रार्जुनावर स्वारी, राजास युद्धार्थ आव्हान, आव्हान ऐकून घबराट, राजाच्या सैन्याशी दुर्दशा-९२. युद्धार्थ राजा निघाला त्या वेळी त्याला अपशकुन होतात-९३.



**अध्याय सतरावा**

## • सहस्रार्जुनाचा वध व शिवधनुष्याची पूर्वकथा •

राजा व राजपुत्र यांच्याशी युद्ध व त्यांचा निःपात-९३. राजाची उद्विग्नता, परशुरामाकडून राजाचा धिःकार, दोघांचे युद्ध-९४. अस्त्रांनी द्वंद्वयुद्ध, चामुंडेचे माघारी येणे, सहस्रार्जुनाचा वध, परशुरामस्तवन, परशुरामाचे मिथिलेला आगमन-९५. जनकाकडून सत्कार, भोजनाचे वर्णन, तांबूलवर्णन, सीता शिवधनुष्याचा घोडा घोडा करून खेळते-९६. सीतेचा विक्रम पाहून परशुरामास परमाश्चर्य-९७.

## अयोध्याकांड

**अध्याय १ ते १८**

अध्याय दुसरा पृष्ठे १५१ ते १५५

**• श्रीरामराज्याभिषेक - प्रारंभ •**

रामराज्याभिषेकाची तयारी, प्रजाजन व राजे यांची सभा, राज्यसभेत दशरथाचे भाषण-१५१. सभाजनांची एकमुखाने संमती -१५२. समारंभाची तयारी, दूरदृष्टीने वसिष्ठांच्या योजना, सर्व नगरीत आनंद व उत्साह, अयोध्या श्रृंगारिली -१५३. दशरथास चिंता, ती रामास निवेदन करतो, दुष्ट ग्रहांचा फेरा, अनिष्ट स्वप्ने व त्यांची अशुभ फले, श्रीरामांचे कौसल्यामंदिरात आगमन, राज्याभिषेकवार्तेमुळे कौसल्या व सुमित्रेस आनंद-१५४. रामांचे स्वगृही गमन, व्रतपरिपालन-१५५.

अध्याय तिसरा पृष्ठे १५५ ते १६१

**• दुष्ट मंथरेचा कैकेयीवर प्रभाव •**

रामराज्याभिषेकनिश्चतीमुळे इंद्रादिकांस चिंता, त्या देवांची ब्रह्मदेवाला विनंती -१५५. विघ्न करण्यासाठी ब्रह्मदेवाची विकल्पास आज्ञा, विकल्पाच्या अडचणी, ब्रह्मदेवाचे रहस्यकथन, कलिंगण फळाच्या द्वारे मंथरेच्या शरीरात प्रवेश, विकल्पाचा तिच्यावर प्रभाव-१५६. मंथरेचा रामाविषयी मत्सर, कुब्जा का म्हणतात? रामराज्याचा आनंदसोहळा पाहून मंथरेचा थयथयाट, मंथरा कैकेयीकडे जाते, क्रोधाचा आविष्कार, कैकेयीला आश्चर्य व जिज्ञासा -१५७. मंथरेचे रामासंबंधी द्वेषाविष्करण, भरतराज्याभिषेकाबद्दल कैकेयीस परमानंद, मंथरा कैकेयीचा संवाद -१५८. सापत्नभावाचे शब्दचित्र, इंद्राचे दितीशी कपटवर्तन, कैकेयीवर झालेला विपरीत परिणाम, मंथरेने सुचविलेली युक्ती, पूर्वीच्या दोन वरांची आठवण-१५९. कैकेयीला बालवयात अवमानित ऋषीकडून शाप व उःशाप, कुब्जेकडून कैकेयीला शिकवण, मंथरेला इनाम, कैकेयीचा क्रोधागारात प्रवेश-१६०.

अध्याय चौथा पृष्ठे १६१ ते १६६

**• कैकेयी-दशरथ संवाद •**

अभिषेकाची सिद्धता, दशरथ कैकेयीच्या भवनात येतो, तेथिल चमत्कारिक स्थिती, राजाची अस्वस्थता, कैकेयीचा अनुनय, कैकेयी राजाची निर्भत्सना करते. दोन स्त्रियांच्या पतीची केविलवाणी अवस्था-१६१. दशरथावर दोषारोप, दशरथाचे निराकरण, क्रोधमहिमा, विकल्पाचे दुष्परिणाम, कैकेयीचे हृदयपरिवर्तन, मंथरेने केलेली खूण, कैकेयीवर अनुकूल परिणाम-१६२. कैकेयी वरपूर्तीचे राजाला आव्हान देते, दोन वरांनी दोन हेतूंची पूर्ती - १६३. वरपूर्तीचा हट्टाग्रह पाहून राजा मूर्च्छित, स्त्रीलोभामुळे दशरथाला पश्चात्ताप, कैकेयीवर राजा संतापतो, कैकेयीला विनवणी, तिला सत्यपरिपालनाचा आग्रह, पूर्वेतिहास-१६४. कैकेयीला पुनः प्रार्थना, रामवनवासाने होणारे दुष्परिणाम, राजाचे लोटांगण व कैकेयीकडून धिक्कार, राजाची बिकट स्थिती-१६५.

अध्याय पाचवा पृष्ठे १६६ ते १७०

**• दशरथ भवनात श्रीरामांचे आगमन •**

प्रातःकाळी सुमंत दशरथास उठविण्यास गेला, दशरथाची काळजी, रामास बोलावण्याविषयी कैकेयीची सुमंतास आज्ञा, अभिषेकाची सर्व तयारी करण्याची वसिष्ठांची सुमंताला अनुज्ञा-१६६. कैकेयी सुमंताला वरांचा वृत्तांत सांगते, सुमंताकडून धिक्कार, सुमंताचे रामभवनात आगमन, भवनवर्णन-१६७. सप्तद्वारांचे पारमार्थिक रूपक, श्रीरामस्वरूपवर्णन, दशरथाच्या बोलावण्यावरून त्याच्याकडे श्रीरामांचे जाणे. परिवारवर्णन-१६८. श्रीरामांना आलेले पाहून राजाची अवस्था, श्रीरामांनी येताच दशरथ-कैकेयीला प्रणिपात, रामांची कैकेयीला प्रार्थना-१६९. रामांच्या क्रोधाबद्दल कैकेयीस भय-१७०.

अध्याय सहावा पृष्ठे १७० ते १७६

**• कौसल्येचे सांत्वन •**

श्रीरामांनी शपथपूर्वक आश्वासन दिल्यानंतर कैकेयीकडून वराचे वृत्तकथन - १७०. पितृवचनपूर्तीचे कैकेयीस आश्वासन, दोन वरांची गोष्ट, वरांचा तपशील, पितृवचन पाळण्याविषयी श्रीरामांचा उत्साह - १७१. कैकेयी आनंदातिशयाने श्रीरामांना दृढालिंगन देते. त्यामुळे तिचे हृदय परिवर्तन, लक्ष्मण कोपाविष्ट होतो. कैकेयी मंदिरात इतर राण्यांचा विलाप, कौसल्या मंदिरात श्रीरामांचे आगमन, पित्याच्या वरांचे कथन-१७२. कौसल्येचा आक्रोश, पितृवचनाचा भंग न करिता मातेची आज्ञा पाळण्याविषयी कौसल्येची युक्ती-१७३. कौसल्येची युक्ती राजाज्ञेला बाधक, पिताजींच्या आज्ञेपेक्षा मातेच्या आज्ञेचे महिमान श्रेष्ठ असा युक्तिवाद, श्रीरामांचे उत्तर, पूर्वीचे उदाहरण, कौसल्येचा आर्त विलाप-१७४. लक्ष्मणाचा संताप व उपाययोजना, लक्ष्मणाला श्रीरामांचा उपदेश, दुसरी पितृपत्नी मातृवत आहे, पराक्रमच गाजवायचा तर राक्षसांसमोर गाजवावा -१७५. लक्ष्मणाचे वंदन, वनात बरोबर नेण्याची प्रार्थना, कौसल्येचे समाधान, वनगमनास अनुज्ञा-१७६.

अध्याय सातवा पृष्ठे १७६ ते १८१

**• सीता-लक्ष्मण वनगमननिर्धार •**

श्रीरामांचा दृढनिश्चय ओळखून कौसल्या त्यांचे स्वस्तयन करते, ब्रह्मदेवादिकांची रामरक्षणाविषयी प्रार्थना -१७६. एकादश रुद्रादि देवतास प्रार्थना -१७७. मातेचे करुणकोमल हृदय, श्रीरामांचा प्रणिपात, कौसल्येचा कळवळा, आकाशवाणीची गर्जना, त्यामुळे कौसल्येच्या जीवाला समाधान -१७८. श्रीरामांचा सीतेला उपदेश, जानकीचे दुःख, तिची विनंती-१७९. बाधेच्या भीतीचा सीतेकडून उपहास, पतिसहवासाचे महत्त्व, स्वतःला वनवासात नेण्याची सीतेची विनंती, सीतेला राम वसिष्ठांकडून आज्ञा घेण्यास सांगतात, वसिष्ठांना विनंती केल्यावरून त्यांची अनुज्ञा मिळते - १८०. लक्ष्मणाची विनंती, स्त्रियांना प्रमदा का म्हणतात, लक्ष्मणाचा बरोबर येण्याचा हट्ट, वसिष्ठांची अनुमती -१८१.

अध्याय आठवा पृष्ठे १८२ ते १८६

**• श्रीरामांचे वनाकडे प्रयाण •**

श्रीराम लक्ष्मणाला मातेचा आशीर्वाद घेऊन आयुधे आणण्यास पाठवितात, श्रीराम, सीता व लक्ष्मण आपले सर्व धन ब्राह्मणांस व गरीबांस दान देतात-१८२. दान कोणास व कोणते द्यावे?-१८३. खजिन्यांतील द्रव्याचा विनियोग, सर्वस्वाचे दान करून दशरथाचा निरोप घेतात, लोकांचा विषाद, श्रीरामांनी वनाचा निर्धार बदलावा म्हणून दशरथाची विनंती, वचनभंग होईल म्हणून श्रीरामांचा नकार-१८४. श्रीरामांचा दृढनिश्चय पाहून राजा सैन्य बरोबर देण्यास सांगतो, कैकेयी क्रोधाविष्ट, त्यामुळे राजाचा संताप, सैन्यसंभार घेण्यास श्रीरामांचा विरोध, वसिष्ठगुरूंचा कोप व कैकेयीचा धिक्कार, दशरथाचा संताप, सीतेला वस्त्रसमर्पण-१८५. तिघांचे पित्यास वंदन, सर्वत्र शोकाकुल आक्रोश, तिघांमागून सर्व नागरिक जातात. नागरिकांना अयोध्येत परतून जाण्याची श्रीरामांची विनंती-१८६.

अध्याय नववा पृष्ठे १८७ ते १९१

**• श्रीरामांचे चित्रकुटावर गमन •**

श्रीरामांच्या प्रयाणानंतर दशरथ व राण्या त्यांच्यामागून धावत जातात, सर्वांचा विलाप, वसिष्ठांनी धीर दिल्यावर सर्वजण अयोध्येकडे परत फिरतात-१८७. ब्राह्मण श्रीरामांच्या मागून धावत जातात, गुहकाचे भागीरथीच्या तीरावर आगमन-१८८. पुढे प्रयाण करतेवेळी तेथूनच सुमंताला परत पाठविला, सुमंताची विनंती, श्रीरामांचे उत्तर, गुहकाकडून झाडाचा चीक आणवून जटाबंधन, गुहकाच्या आईची

प्रार्थना-१८९. श्रीरामांना संतोष, गंगापार होऊन त्रिरात्र मुक्काम. त्रिवेणी दर्शन, गंगायमुनेस आनंद, नित्यविधी उरकून भरद्वाजाश्रमास गमन, तिथेच राहण्याबद्दल ऋषींचा आग्रह, आपण राहिल्यामुळे अयोध्येचे नागरिक येऊन शांतिभंग होईल वगैरे अडचणींचा निर्देश-१९०. ते भारद्वाजांनी मान्य करून चित्रकुटाचे नाव सुचविले. सिद्धवटदर्शन, सीतेची प्रार्थना, चित्रकुटी आगमन, आश्रम बांधण्याची लक्ष्मणाला आज्ञा-१९१.

**अध्याय दहावा** **पृष्ठे १९१ ते १९५**

**• दशरथाचे प्राणोत्क्रमण •**

गुहकाकडे सुमंताचा मुक्काम -१९१. दूतांतर्फे श्रीरामांच्या निवासाची माहिती, सुमंताचे अयोध्येत परत येणे, तेथील विलाप, सुमंताला पाहून राजा बेशुद्ध, सुमंताकडून राजाला निवेदन -१९२. वनवासात निराहार राहून तीन रात्र जलपान, दशरथाचा प्राणान्त करणारा विलाप, दशरथाचे 'राम राम' म्हणतच दुःखद निधन-१९३. कौसल्येचा विलाप, कैकेयीचा धिक्कार, कौसल्या सहगमनार्थ सिद्ध, राण्यांचा शोक, नागरिकांकडून कैकेयीचा धिक्कार-१९४. राजाच्या निधनानंतर अनेक ऋषींचे आगमन, प्रधानादिकांचे आगमन, दहनविधीची चर्चा, वसिष्ठांनी तेलाने भरलेल्या नौकेत राजाचा देह ठेविला, भरताला आणण्यास सुमंताला पाठविले-१९५.

**अध्याय अकरावा** **पृष्ठे १९६ ते २००**

**• श्रीरामपादुकांना पट्टाभिषेक •**

श्रीरामांची त्यागबुद्धी पाहून सुमंताची अवस्था, लक्ष्मण व सीतेला श्रीरामसेवेचे भाग्य लाभते, ते आपणास न लाभल्यामुळे सुमंताला विषाद, मातुलगृही भरताला दुःस्वप्न-१९६. वसिष्ठांनी केलेली योजना, सुमंताचे भरताकडे आगमन, सुमंताबरोबर भरत-शत्रुघ्नांचे अयोध्येकडे प्रयाण, अयोध्येचे बदललेले स्वरूप, सुमंताकडून वृत्तांतकथन, भरताचा विलाप-१९७. भरताचा रामवियोगामुळे आक्रोश-१९८. कैकेयीची निर्भत्सना, मंथरेवर क्रोधदृष्टी, वसिष्ठ त्यापासून भरताला परावृत्त करतात. गो-ब्राह्मण-स्त्री अवध्य, अभिषेक करून घेण्यास भरताचा वसिष्ठांना नकार,-१९९. शत्रुघ्नाची अवस्था, वसिष्ठांनी उपाय सुचविला, कौसल्येचा सहगमनाचा विचार, श्रीरामभेटीचे कुलगुरूंचे वचन, त्यामुळे तिला मनःशांती, श्रीरामपादुकांवर अभिषिंचन, दशरथाची उत्तरक्रिया-२००.

**अध्याय बारावा** **पृष्ठे २०१ ते २०६**

**• भरताचे वनप्रयाण व गुहकाशी संवाद •**

कैकेयी भरताला उपदेश करते, सापत्नभावाचा वेदकालीन इतिहास, माझे ऐकून राजा हो, शत्रुघ्नाने युवराज व्हावे, त्यामुळे भरताचा संताप व उद्वेग, त्याने आईची निर्भत्सना करून तिला घराबाहेर घालविले -२०१. श्रीराम भरतादि चारी बंधूंचे पिंडैक्य, भरताचा श्रीरामांची भेट घेण्याचा निर्धार, वसिष्ठ भरताच्या मनाची कसोटी पाहातात, वसिष्ठांची सूचना ऐकून भरताला मूर्च्छा, त्याचा विलाप, मातेची निंदा, राज्याभिषेकाला भरताचा नकार, त्यामुळे वसिष्ठांना आनंद, वसिष्ठांसह सर्वांचे रामदर्शनासाठी प्रयाण-२०२. श्रीरामप्रेमी नागरिकांची दर्शनोत्सुकतेमुळे तारांबळ, धावपळ, भरताच्या सैन्याचे वर्णन-२०३. भरत सैन्य पाहून गैरसमजाने गुहक गंगाकिनारी युद्ध करण्यास सज्ज, भरताचे व गुहकाचे ऐक्य-२०४. भरताला गुहक श्रीरामांची निवासाची जागा दाखवितो, त्या दोघांचा संवाद, श्रीरामांना अरण्यजीवन कंठावे लागणार म्हणून सर्वजण उद्विग्न-२०५. गुहक सर्वांना नावेतून गंगेच्या परतीराला नेतो-२०६.

अध्याय तेरावा पृष्ठे २०६ ते २११

**• भरताचे चित्रकुटावर आगमन •**

स्नानसंध्या व त्रिवेणीला साष्टांग प्रणिपात-२०६. गोदान, पिंडदान, धनदान, भरद्वाज सामोरे येताच भरताचे वंदन, गैरसमजामुळे भरद्वाजांचा भरतावर दोषारोप-२०७. ते ऐकून भरत उद्विग्न, भरताच्या निर्मळ हृदयाचा परिचय होताच भरद्वाजांचा संतोष, वसिष्ठांची हमी, वसिष्ठ वाणीमुळे भरद्वाजांचे मतपरिवर्तन -२०८. भरद्वाजांचे भरत, वसिष्ठांना सैन्यासह स्वागताचे निमंत्रण, पूर्वी जमदग्नींनी कामधेनूला पाचारण केले असता जो विपरीत अनुभव आला तसा या वेळी येऊ नये म्हणून तपःसामर्थ्याने स्वागताची तयारी, स्वागत समारंभाचे सविस्तर वर्णन, पंक्तीचा लाभ घेणारे रामनामस्मरणाने जन्ममरणमुक्त झाले-२०९. या देवाभिलषित समारंभाला भ्रमर, शुक, सारिका, कोकिळा व वनशोभेची सुसंवादी सुरेल साथ, सर्व उपस्थितांची तृप्ती-२१०. भरद्वाजांचा भरताला प्रेमाशीर्वाद, भरद्वाजांचे सर्व ऋषींना वंदन, वसिष्ठांचा आशीर्वाद, सर्वांचे चित्रकुटी प्रयाण-२११.

अध्याय चौदावा पृष्ठे २११ ते २१५

**• श्रीरामांकडून दुष्ट कावळ्याला शिक्षा •**

चित्रकुटावर श्रीरामांची दैनंदिन चर्या, लक्ष्मणाची सेवा-२११. सीतेला आश्रमात ठेवून लक्ष्मण फळे आणावयास वनात गेला असता सीतेवर गंधर्वरूपी कावळ्याचे आक्रमण, सीतेचा आक्रोश ऐकून श्रीरामांनी कावळ्यावर ईषिकास्त्र (दर्भाचे अस्त्र) सोडले, तो कावळा हतबल, अगतिक होऊन शेवटी नारदांच्या सांगण्यावरून श्रीरामांना शरण-२१२. कावळा मनुष्यवाणीने श्रीरामांची प्रार्थना करतो, सीतेच्या स्तनांचे चुंबन घेतल्याबद्दल कावळ्याची क्षमायाचना, सीतेची दयाबुद्धी व श्रीरामांस प्रार्थना-२१३. अस्त्राचे अमोघत्व रक्षण करण्यासाठी कावळ्याचा एक डोळा नष्ट केला, श्रीरामांची कृपा लाभल्यामुळे दोन डोळ्यांचे कार्य एका डोळ्याकडे आले, कावळ्याने सीतेच्या स्तनांचे चुंबन घेतल्यांबद्दल नरकतुल्य किळसवाणी घाण भक्षण करण्याचा त्याला शाप-२१४.

अध्याय पंधरावा पृष्ठे २१५ ते २२०

**• श्रीराम-भरत भेट •**

भरताचे चित्रकुटाकडे प्रयाण, सैन्याच्या गजबजाटाने त्या परिसरांतील वनचर व रहिवाशांची धांदल - २१५. कोणाचे सैन्य आहे त्याचा शोध घेण्याचा लक्ष्मणाला आदेश, ध्वज-पताकांवरून अयोध्येची सेना आली म्हणून लक्ष्मणाचा संताप व लढाईची सज्जता-२१६. रामाने केलेली लक्ष्मणाची कानउघाडणी, रामचंद्रांनी वर्णिलेले सापिंड्य, त्याचा प्रभाव-२१७. लक्ष्मणाचा विस्मय, सैन्यातून श्रीरामांचा जयजयकार, रामदर्शनाची भरताची उत्सुकता-२१८. सर्वांच्या भेटी व भावनाविष्कार-२१९.

अध्याय सोळावा पृष्ठे २२० ते २२२

**• श्रीरामांकडून पिंडदानविधी •**

श्रीराम भरतास अयोध्येचे कुशल विचारतात-२२० भरत दिङ्मूढ झाल्यामुळे शत्रुघ्नाकडून वृत्तनिवेदन, राम-लक्ष्मण, सीता व सर्वांचा शोक, दशरथाची उत्तरक्रिया, कौसल्या वगैरे मातांच्या भेटी-२२१. पिंडदान, गयागदाधर दर्शन-२२२.

अध्याय सतरावा पृष्ठे २२२ ते २२७

**• भरताचे समाधान •**

लक्ष्मणाने बांधलेल्या पर्णशाळेचे सर्वांनी केलेले कौतुक-२२२. प्रधान व सर्व सैन्याची श्रीरामांची भेट, श्रीरामांनी अयोध्येत यावे म्हणून भरताची प्रार्थना, पितृवचनाचा भंग होईल म्हणून श्रीरामांचा भरतास नकार, भरताचा श्रीरामांना कळकळीचा आग्रह-२२३. भरताचा मायेबद्दल युक्तिवाद, श्रीरामांच्या

नकारामुळे भरत आमरणान्त अन्नत्यागासाठी निर्धाराने बसतो-२२४. श्रीरामांचाही प्रतिज्ञापूर्तीचा वज्रकठोर निर्धार. दोघांच्या निर्णयामुळे वंशक्षय होईल म्हणून सर्वांचा आक्रोश-२२५. अशा संघर्षाच्या प्रसंगी वाल्मिकींनी येऊन भरताला रहस्य निवेदन केले -२२६. वाल्मीकींच्या भाषणाने भरताचे समाधान. सर्वांना आनंद-२२७.

**अध्याय अठरावा** पृष्ठे २२७ ते २३२

**• श्रीरामपादुकांसह भरत अयोध्येत येतो •**

भरत श्रीरामांची क्षमायाचना करतो-२२७. श्रीराम भरताचे सांत्वन करतात, रामाज्ञेने अयोध्येला निघालेला भरत रामविरहामुळे पुढे जाऊ शकत नाही, वसिष्ठांची युक्ती व रामपादुका भरतास अर्पण, कैकेयीला दोष न देण्याविषयी भरताचे आश्वासन -२२८. भरत नंदिग्रामात राहून शत्रुघ्नाकडून राज्यकारभार करवितो. चौदा वर्षे चौदा दिवसांनी आपण वनवासातून परत येऊ असे रामवचन, निरोप व अयोध्येकडे भरत-शत्रुघ्नांचे प्रयाण-२२९.

## अरण्यकांड

### अध्याय १ ते २३

**अध्याय पहिला** पृष्ठे २४५ ते २४८

**• श्रीरामांचे दंडकारण्यात गमन •**

श्रीरामनाम महिमा-२४५. भरताचे अयोध्येकडे प्रयाण, ब्राह्मणांची कुजबूज, जाबाली ऋषींकडून वृत्तांकथन-२४६. राक्षसांच्या युद्धाची भीती, गुप्तस्थानी जाण्याची सूचना, राक्षसांच्या प्रचंड सेनेपुढे तिघांचा पाड कसा लागणार-२४७. श्रीरामांच्या नकारामुळे ब्राह्मणांचे तेथून प्रयाण-२४८.

**अध्याय दुसरा** पृष्ठे २४८ ते २५४

**• विराध राक्षसाचा वध •**

अत्री आश्रमात श्रीरामांचे आगमन, अनसूया व सीतेची भेट, सीतेचे अभिनंदन-२४८. सीतेला पतिव्रताव्रत व दिव्य वस्त्रसमर्पण, उटी व सुमनमालेचे दान, अनसूयेची पूर्वकथा, दहा हजार वर्षे उग्र तपश्चर्या, अनसूया का म्हणतात-२४९. अवर्षणकालात सर्वांचे रक्षण, ब्रह्मा, विष्णू, महेश कसोटी घेण्यास येतात, जलप्रोक्षणाने तिघेही देव बालक झाले, देव-स्त्रियांची केविलवाणी स्थिती, देव-स्त्रियांनी अनसूयेची प्रार्थना करून पतिराजांची मुक्तता केली, दत्तात्रेय अवताराची उत्पत्ती, त्यांचा आशीर्वाद-२५०. अत्री ऋषींच्या अनुज्ञेने श्रीराम तेथून पुढे जातात, भयविव्हल करणारे विराधवन, विरोधाकडून सीताहरण, रामस्मरणाने सीता निर्भय, लक्ष्मणाकडून अरण्य साफ होताच विराधाचे रामलक्ष्मणांना दर्शन -२५१. विराधाकडून श्रीरामांचा अधिक्षेप, श्रीरामांचे उत्तर, विराधाची दर्पोक्ती, लक्ष्मणाचे शरसंधान, श्रीरामबाणाने विराध विद्ध, विराधाला आत्मबोध, विराधकृत रामस्तुती-२५२. पूर्ववृत्तांत, शाप, उःशाप सांगून विराध गंधर्वलोकी जातो, जातेवेळी विराध श्रीरामांना शरभंगऋषींच्या आश्रमात जाण्यास सांगतो -२५३. श्रीरामांचे आगमन होणार म्हणून शरभंगाने सत्यलोकाला जाण्याचे नाकारले - २५४.

**अध्याय तिसरा** पृष्ठे २५४ ते २५७

**• शरभंगऋषींचा उद्धार •**

श्रीरामांचे शरभंगाश्रमात आगमन, ब्रह्मदेवाचे विमान धाडले, रामदर्शनापुढे सत्यलोकाची किंमत नाही-२५४. श्रीरामांनी शरभंगाचे दर्शन घेतले, शरभंगाकडून स्ववृत्तकथन-२५५. श्रीरामांना सुतीक्ष्णऋषीकडे जाण्याची शरभंगाची सूचना. शरभंगऋषी श्रीरामांसमोर आत्मदहन करून सत्यलोकाला जातात, सत्यलोकमहिमा-२५६.

हाती जाते, त्याची धार पाहण्यासाठी घाव मारतो, तो नेमका झाडीतील सांबावर पडून त्याचा मृत्यू, ब्रह्महत्या दोष घडला असावा अशा शंकेने लक्ष्मण व्याकूळ-२७९. श्रीरामांनी मृतदेहाचा वर्ण विचारला, शोध घेतल्यावर तो देह राक्षसाचा असल्याचे कळून आले, त्यामुळे ब्रह्महत्या झालीच नाही. लक्ष्मणाला परमानंद, राक्षस वधाने दोष नाही-२८०. शूर्पणखेला पडलेले वाईट स्वप्न, रावणाला निवेदन व तिचे पद्मपुरास आगमन, मुलाचे निधन कळल्यावर तिचा शोक, लक्ष्मण दिसताच त्याच्या सुडाचा निर्धार, तिचे वेषांतर, शूर्पणखेची लक्ष्मणाला लग्नाची विनंती-२८१. लक्ष्मणाने सांगितल्यावरून ती रामांकडे जाते, लक्ष्मणाला आपल्याबरोबर लग्न करण्यास आज्ञा देण्याची विनंती करते, श्रीरामांना तिच्या डोळ्यांवरून तिची ओळख पटते, रामांकडून तिची बोळवण-२८२. तिच्या पाठीवर लक्ष्मणास सूचना, श्रीरामांच्या सूचनेप्रमाणे तिची संभावना, तिचा आक्रोश व पलायन -२८३. लक्ष्मणाने घडलेले श्रीरामांना निवेदन केले, या घटनेपासून राक्षसांशी भांडणाला प्रारंभ-२८४.

**अध्याय नववा** पृष्ठे २८४ ते २९०

## • खर-दूषणांशी युद्ध •

विद्रूप शूर्पणखा पद्मपुरीला जाते, खर-दूषण राक्षसांस निवेदन व त्यांचा संताप-२८४. शूर्पणखेकडून रामस्वरूपवर्णन व वृत्तांतकथन, तिच्या कपटामुळे ती विद्रूप होते, तिचा आक्रोश व सूडबुद्धी, चौदा दूतांना रवाना केले, त्या चौदा जणांना श्रीरामांचा प्रश्न-२८५. दूतांचे प्रत्युत्तर व श्रीरामबाणांनी त्यांचा नाश, लक्ष्मण क्रोधाने शूर्पणखेचा वध करण्यास प्रवृत्त, स्त्रीवध निषिद्ध म्हणून श्रीरामांनी प्रतिबंध केला, श्रीरामबाणाने चौदा राक्षसांना उत्तम गती प्राप्त-२८६. शूर्पणखेने वृत्तांत सांगितला, रामप्रतापाचा परिणाम, चौदा हजार सैन्यासह खर, दूषण व त्रिशिरा यांचे प्रयाण-२८७. अपशकून, अपशकुनांबद्दल तुच्छता व शूर्पणखेला आश्वासन-२८८. भीतीमुळे ऋषींचे पलायन, श्रीराम एकटेच राक्षस सैन्याशी लढतात. श्रीरामांच्या शौर्यामुळे सीतेला आनंद व अभिमान, खराचे दूषणाला प्रोत्साहन, राक्षसांना श्रीराम कसे दिसले?-२८९.

**अध्याय दहावा** पृष्ठे २९० ते २९४

## • दूषण राक्षसाचा वध •

श्रीरामांचे युद्धकौशल्य, राक्षसांचा संहार-२९०. खर व बारा वीर पुढे येतात, कपटप्रवीण बारा राक्षसांचा दमनीशक्तीने केलेला संहार, त्यामुळे राक्षसांची दाणादाण-२९१. रणातून पळणाऱ्या राक्षस सैन्यास दूषणाचे आश्वासन, श्रीरामांनी दूषणाचा रथ, घोडे व सारथी यांना मारले, दूषणाशी भयंकर रणकंदन व त्याच्याच शस्त्राने त्याचा वध-२९२. दूषणाचा वध झालेला पाहून त्याचे तिघे साथीदार पुढे आले, महाकपाळ, स्थूळाक्ष व प्रमाथी या तिघांना श्रीरामांनी ठार केले -२९३. सहकारी राक्षसांचा विध्वंस-२९४.

**अध्याय अकरावा** पृष्ठे २९४ ते ३०१

## • त्रिशिरा व खर राक्षसांचा वध •

दूषणाच्या वधानंतर खर व त्रिशिरा हे पुढे येतात, त्यांच्या वल्गना, त्या दोघांची गर्वोक्ती, श्रीरामांचे प्रत्युत्तर-२९४. श्रीरामबाणांनी रथ, घोडे व सारथी यांचा नाश झाल्यावर त्रिशिरा विरथी होऊन लढतो. कार्तिकस्वामीच्या वराने प्राप्त झालेली शक्ती हातात घेतो, त्यामुळे सर्व सचिंत, त्रिशिऱ्याने सोडलेली शक्ती श्रीरामांना वंदन करून त्यांच्याच भात्यात जाते -२९५. श्रीरामांच्या सुवर्णपंखी बाणाने त्रिशिराचा गोंधळ व त्यातच त्याचा अंत, खर राक्षस व श्रीरामांचा रणसंग्राम-२९६. खराने सोडलेल्या वरदबाणांची निष्फळता-२९७. रामकवचबंधनाचा खराने केलेला छेद, खराचा मुकुट पाडून त्याला बाणांनी घायाळ, खराने सोडलेली शक्तीही श्रीरामांच्या भात्यात प्रविष्ट झाली, श्रीरामांनी निर्वाणीचे बाण खरावर सोडले,

दिलेल्या आज्ञेचे लक्ष्मण स्मरण देतो, सर्व अनर्थाचे मूळ कारण स्त्रीबुद्धी, सीतेचा संताप व लक्ष्मणाला अभिशाप - ३१६. आत्मघात करण्याची सीतेची धमकी, लक्ष्मणाचा मनःक्षोभ, सीतेला रामाज्ञेची स्पष्ट जाणीव, लक्ष्मणाच्या शपथा व निरूपायाने जाणे-३१७. आश्रमातून जाताना रेषाबंधन व ती रेषा न ओलांडण्याचा सीतेला दंडक, श्रीराम व लक्ष्मण यांची भेट-३१८. सीतेच्या रक्षणाविषयी विचारल्यावर लक्ष्मण गहिवरतो, स्त्रीवाक्याच्या कठोरपणामुळे सीतेला एकाकी सोडणे भाग पडले. वृत्तांत निवेदन, सीतेच्या मर्मभेदक बोलण्याचा परिणाम-३१९. श्रीरामांचे लक्ष्मणाला आलिंगन, श्रीरामांना खऱ्या रहस्याची कल्पना असल्यामुळे सीतेच्या वर्तनाची त्यांना जाणीव होती-३२०.

अध्याय सोळावा — पृष्ठे ३२१ ते ३२६

## • सीताहरण •

लक्ष्मण आश्रमातून गेल्यावर भिक्षेकऱ्याच्या वेषात रावणाचे आगमन, सीतेला पाहून रावणाची झालेली अवस्था, देव, दानव, गंधर्वादि स्त्रियात तिच्या तुलनेची कोणीही नाही-३२१. रावणाचा सीतेला प्रश्न - या भयावह अरण्यात तू एकटी कशी आलीस ? स्वयंवरापासून साद्यंत वृत्तांत सीता सांगते-३२२. येथे मी एकटीच नसून माझे दोघेजण संरक्षक आहेत, ते येईपर्यंत थांबण्याची विनंती, रावणाने सीतेला निर्भय असण्याचे कारण विचारल्यावरून तिने पूर्वीची कावळ्याची कथा सांगितली. शूर्पणखा वगैरे कपटीवेषाने आलेल्यांची रामाने बोळवण कशी केली, असे सांगून सीता बसण्यासाठी आसन देते, तिला पळविण्यास लक्ष्मणरेषेची अडचण-३२३. अत्यंत भुकेचे ढोंग करून रावण सीतेला त्या रेषेच्या बाहेर आणतो, सीता भिक्षा आणण्यास आत गेली असता आश्रमात देवांचे आगमन, सुरगणांची भीती-३२४. देवांना सीतेने रहस्य सांगून समाधान केले, भिक्षा घालण्यासाठी स्वतः न जाता आपल्या छायेला पाठवले, मूळ रूपात व छायेत तंतोतंत साम्य, भिक्षा वाढीत असता रावणाने तिला धरले व तो खऱ्या स्वरूपात प्रकटतो, सीतेजवळ रावणाचा अनुनय-३२५. सीतेचा आक्रोश, रावणाला धाक देते, वयाचा विचार करताही त्याचा हा प्रयत्न निंद्य व दूषणास्पद-३२६.

अध्याय सतरावा — पृष्ठे ३२६ ते ३३३

## • जटायु-रावण युद्ध •

सीतेला रथात बसवून रावणाचे प्रयाण-३२६. सीतेचा विलाप, आक्रंदन व लक्ष्मणाबद्दल अनुताप, लक्ष्मणाचा धावा, रामाचा धावा करून त्यांना मृगासाठी पाठविल्याबद्दल मनस्ताप-३२७. स्त्रियांनी पतिजवळ मागणे करू नये, सीतेचा अनुताप, पंचवटीतील सर्व चराचर सृष्टीला सीतेचा संदेश, रामांना समजल्यावरोबर ते मागोमाग येतील असा तिला विश्वास - ३२८. सीतेचा धावा ऐकून रावण घाबरला व तो आकाशमार्गाने जाऊ लागला, मार्गात जटायूचे आगमन-३२९. जटायूने आपल्या पंखांच्या तडाख्याने रावणाचा रथ थांबवून त्याला युद्धाचे आव्हान, रावण-जटायू द्वंद्वयुद्ध, युद्धामुळे मार्गात विलंब होऊ लागल्यामुळे रावणाला राम येण्याची भीती, रावणवाणाविषयी जटायू निर्भय, रावणाचे धनुष्य मोडून, मुकुट पाडून शरीरावर हल्ला-३३०. रावणाचा रथ, घोडे, सारथी यांचा विध्वंस, रावण गुप्तरूपाने आकाशमार्गाने जातो, तरीही जटायूने त्याला मार्गांत गाठून घायाळ केले, सीतेला सोडून रावण पळाला, सीता मुक्त झाल्यावर जटायूचे तिला अभयवचन-३३१. स्वर्गस्थ देवांना चिंता, रावणाने परत येऊन जटायूला द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले, पुन्हा रावणाचा पराजय, रावणाचे कपटी वर्तन, परस्परांचे मरण कशात आहे ते सांगावे, जटायूला रामांची शपथ, त्याप्रमाणे जटायू खरे व रावण खोटे सांगतो, जटायूच्या मर्मावर रावणाचा आघात, अवंढापट्टा येथे रावणाचा अंगठा पडतो-३३२. जटायू श्रीरामदर्शनाची वाट पाहात नामस्मरण करीत राहतो-३३३.

अध्याय अठरावा पृष्ठे ३३३ ते ३३९

**• रावण सीतेला अशोकवनात पाठवतो •**

जटायू मूर्च्छित झाल्यामुळे सीतेचा शोक-३३३. रावणाला रामांच्या सामर्थ्याची सीता जाणीव देते, सीतेला धरताना तिच्या हिसक्याने रावण खाली पडतो, वीस हातांनी तिला धरून पुढे प्रयाण, आपला शोध लागावा म्हणून सीता अलंकार टाकीत जाते-३३४. एका पर्वतावर पाच वानर बसलेले पाहून सीता उत्तरीय वस्त्रांत अलंकार बांधून खाली टाकते, ते अलंकार हनुमंताच्या हातात पडतात, सीतेचा आक्रोश, हनुमंताचा संताप व उड्डाण, ते पाहून रावणाने तळात जाऊन लंकेत प्रवेश केला, रावणाकडून सीतेला विवाहाबद्दल आग्रह, भावी सुखाची प्रलोभने-३३५. सीतेकडून रावणाचा धिक्कार, राम-रावणाची तुलना व त्याची निर्भर्त्सना-३३६. कपटकर्मप्रवीण अशा चौदा राक्षसांना रामांवर हल्ला करण्यासाठी पाठवितो, नंतर रावणाने अत्युत्तम सजविलेल्या रंगमहालात सीतेला नेली, आत्मविश्वासी सीता निर्भयपणे महालात जाते, सीतेचे अद्भुत सामर्थ्य लक्षात येऊन रावण सीतेच्या पाया पडून भोगाची याचना करतो-३३७. अत्यंत तुच्छतेने झिडकारून सीता त्याचा उपहास करते, त्यामुळे रावण क्रुद्ध होऊन तिला धमकी देतो व रामलक्ष्मण मेल्याचे खोटे सांगतो. सीतेकडून पुनः निर्भत्सना-३३८. रामबाणांनी तुझा समूळ संहार होईल असे सीता त्याला बजाविते, सीतेचा रुद्रावतार पाहून रावण घाबरतो व तिला अशोकवनात पाठवितो-३३९.

अध्याय एकोणिसावा पृष्ठे ३३९ ते ३४६

**• श्रीरामांचा सीताशोक •**

सीतेवर राक्षसिणींचा पहारा असतो त्याचे वर्णन-३३९. सीतेला भीती निर्माण करण्याची राक्षसिणींना आज्ञा, सर्व प्रयत्न वाया गेल्यामुळे दुःख-३४०. राम व लक्ष्मण आश्रमाकडे येतेवेळी त्यांना मार्गात अपशकुन होतात. आश्रमात सीतेला एकटी ठेवून आल्याबद्दल लक्ष्मणाला दोष, पंचवटीत कोठेच सीता आढळेना म्हणून सर्वत्र शोधाशोध, रामाचा अनावर क्रोध-३४१. श्रीरामांची मानसींची भूमिका, सीतेसाठी शोक व करुणाद्रचित्त-३४२. वाटेत सीतेचा शोध व रामांचा विलाप, चराचर सृष्टीलाच सीतेविषयी पृच्छा-३४३. मार्गात सोन्याचा अलंकार दिसतो, जरासे पुढे गेल्यावर मोडलेले धनुष्य, रथ, छत्र, भाता व बाण इत्यादी आढळते-३४४. सीतेला राक्षसांनीच पळविले अशा भावनेने श्रीरामांना आलेला क्रोध व त्याचे आविष्कारण, लक्ष्मणाने क्रोध शांत केला-३४५.

अध्याय विसावा पृष्ठे ३४६ ते ३५२

**• उमा व श्रीराम यांचा संवाद •**

पौर्णिमेच्या रात्री गवताच्या अंथरुणावर पहुडले असता श्रीरामांचा झालेला मनःक्षोभ, कामज्वराची पीडा व श्रीरामांची मनःस्थिती-३४६. श्रीरामांची ही अवस्था पाहून पार्वतीने श्रीशंकरांना केलेला प्रश्न, शिवाचे उत्तराने उमेचे उपहासगर्भ हास्य, शिवाच्या अनुज्ञेने उमा रामांची कसोटी पाहण्यासाठी निघते, सीतेचे रूप घेऊन उमा रामांकडे जाते-३४७. त्या उमारूपी सीतेची उपेक्षा केलेली पाहून लक्ष्मणाला आश्चर्य, तसेच स्वर्गस्थ देवांनाही गूढविस्मय, नंतर ती सीतास्वरूपी उमा श्रीरामांना प्रश्न करते. श्रीराम तिचे सत्य स्वरूप ओळखून तिला तुकाई जगदंबा अशी हाक मारतात-३४८. श्रीरामांच्या प्रश्नाने उमा उद्विग्न व तिची शरणागती, खऱ्या स्वरूपाचे ज्ञान सांगण्याविषयींच्या उमेच्या विनंतीवरून, ते ज्ञान शिवापासूनच प्राप्त करण्याचा श्रीरामांचा तिला आदेश, ज्ञानप्राप्ती करून घेणाऱ्या शिष्याची चित्तशुद्धी असणे आवश्यक, पश्चात्तापदग्ध उमेची श्रीरामांची प्रार्थना, त्यामुळे रामांचे समाधान व रहस्य-स्पष्टीकरण - ३४९. श्रीरामांचा उपदेश, उमेचे आश्वासन, लक्ष्मणावर व इतरांवरही या अद्भुत घटनेमुळे परिणाम-३५०. उमा-शीव संवादाचा मूळ आधार शिवरामायण, मूळ रामायण शतकोटी श्लोकसंख्येचे

होते. त्याची विभागणी करण्याच्या बाबतीत स्पर्धा, विभाजनाचे काम ब्रह्मदेवाने श्रीशिवाकडे सुपूर्त केले, श्रीशिवाकडून विभागणी, शेवटी उरलेली 'राम' ही दोन अक्षरे विभागणे अशक्य असल्याने शिवाने ती स्वतः घेतली, लोकविभाग व पोटविभाग, बहुत प्रकारची रामायणे-३५१.

**अध्याय एकविसावा** — पृष्ठे ३५२ ते ३५७

**• जटायूचा उद्धार •**

सीतेच्या शोधासाठी मार्गक्रमण चालू असता अद्भुत राक्षसाचा पाय आढळतो-३५२. अधिक पुढे गेल्यावर रक्ताने माखलेला असा एक अति भव्य देह आढळला, जटायूने स्वतःची ओळख देऊन वृत्तांत निवेदन केला, आश्रमातून राव०णाने सीतेला पळविली, ते मी प्रत्यक्ष पाहिल्याने युद्ध केले -३५३. जटायूसमोर रावणाचे सामर्थ्य निष्फळ ठरते, रावणाने घाबरून सीतेला मुक्त केली, रावणाची मानहानी, त्यामुळे युद्धासाठी त्याचे पुनरागमन, रावणाचे कपटाचरण, डोळ्यासमोर सीता पळविल्यामुळे जटायूला दुःख-३५४. जटायूचे वृत्त ऐकून रामलक्ष्मणास दुःख, जटायू बेशुद्ध असल्यामुळे सीतेला कोठे नेली हे माहीत नव्हते, रामाची त्यास बरा करण्याची इच्छा व तसे आश्वासन, जटायूने हास्य करून मुक्तीची इच्छा केली, असे तुझ्या सन्निध मरण येणे फार दुर्लभ-३५५. श्रीरामांनी त्या जटायूला उत्तम गती दिली, जटायूने श्रीरामांना तीन वेळा प्रदक्षिणा करून विमानारोहण केले-३५६. स्वर्गात राजे दशरथांची भेट झाल्यावर त्यांना सीताहरणाचे वृत्त न सांगण्याची श्रीरामांची जटायूला विनंती, ते वृत्त स्वतः रावण मागाहून सांगेल-३५७.

**अध्याय बाविसावा** — पृष्ठे ३५७ ते ३६३

**• कबंध राक्षसाचा उद्धार •**

पुढे मार्ग क्रमीत असताना लक्ष्मणाला अपशकुन होऊ लागतात-३५७. मार्गात जवळपास कोणीतरी राक्षस असेल तर त्याचे पारिपत्य करून पुढे जाण्याचा विचार, तेवढ्यात दीर्घ शरीर, लांबच लांब हात, पोटात मुख व तुटक्या पायांचा असा भयानक प्राणी दिसतो. त्याचे भीतिप्रद वर्णन, कबंधाच्या कक्षेत आल्याबरोबर रामलक्ष्मणांना ओढण्याचा त्याचा प्रयत्न-३५८. परंतु श्रीरामांना ओढता न आल्याने जिज्ञासा, कबंधाचा पुनः आवळण्यास प्रारंभ, श्रीराम स्वतःचा वृत्तांत कबंधाला सांगतात, त्याचे बाहू कापण्याची लक्ष्मणाला आज्ञा-३५९. लक्ष्मणाच्या प्रश्नावरून कबंधाने आपला वृत्तांत सांगितला, कश्यपभार्या दनीचा पुत्र दनू स्थूलशिरा ऋषींच्या शापाने कबंध राक्षस झाला, ब्रह्मदेवाच्या वराने दीर्घायुष्य मिळविले, त्या वराच्या उन्मत्तपणाने इंद्राशी केलेल्या युद्धात इंद्राने त्याला विद्रूप केला-३६०. श्रीरामदर्शनाने त्याचा उद्धारकाळ समीप आला, कबंधाच्या विनंतीवरून त्याचे दहन केले.-३६१. सीतेला रावणाने नेली हे कबंधाने रामांना सांगितले - ३६२. दहन झाल्यावर विमानात बसून कबंध श्रीरामांना सुग्रीवाशी सख्य करण्यास सांगतो, दोघांचे दुःख एकच असल्याने उभयता मैत्रीस योग्य, पंपासरोवरावर सुग्रीवाची भेट व मैत्री होईल, वालीचा वध झाल्यावर मैत्री होऊन सीतेचा शोध लागेल - ३६३.

**अध्याय तेवीसावा** — पृष्ठे ३६४ ते ३७०

**• शबरीचा उद्धार •**

पंपासरोवरावर विश्रांती, शबरीच्या आश्रमास भेट, शबरीने केलेले स्वागत, रामांचा शबरीस उपदेश व प्रश्न-३६४. शबरीचे उत्तर, श्रीरामांस तेथे राहण्याची विनंती-३६५. श्रीरामांनी शबरीची स्तुती केली, शबरीची प्रार्थना, रामांची अनुमती व शबरीचा उद्धार-३६६. वनशोभा पाहात असता श्रीरामांचा चित्तक्षोभ, ज्यांच्या ज्यांच्या कुजन-क्रीडेमुळे श्रीरामांना मनस्ताप झाला त्यांना त्यांना शाप व उःशाप, कोकिळा, हरिण, हत्ती व हत्तीण-३६७. मोर व लांडोरी, कावळा, चक्रवाक-चक्रवाकी -३६८. ऋष्यमूक पर्वताकडे, ऋष्यमूक असे का म्हणतात? वालीच्या भीतीने सुग्रीवाने या पर्वताचा आश्रय घेतला, अरण्यकांडाची सारांशरूप उजळणी-३६९.

# किष्किंधाकांड

## अध्याय १ ते १८

अध्याय पहिला

पृष्ठे ३८१ ते ३८५

### • श्रीराम-हनुमंत भेट •

श्री एकनाथांचे आत्मनिवेदन-३८१. पूर्वीचे कथानुसंधान, शबरीचा उद्धार करून श्रीरामलक्ष्मण किष्किंधेकडे निघाले, रामलक्ष्मणांना सशस्त्र आलेले पाहून, त्यांना आपल्याला मारण्यासाठी वालीनेच पाठविले असावे असा सुग्रीवाचा गैरसमज, त्यामुळे घाबरून तो गुहेत लपतो.-३८२ हे कारण समजल्यावर हनुमंताला आश्चर्य, त्यांचे वृत्त आणण्यासाठी हनुमंताला सुग्रीवाची संमती, फार सावधपणे राहून माहिती आण, हनुमंताचे प्रयाण, आईच्या सांगण्याचे मारुतीला स्मरण, लक्ष्मणाचे मांडीवर श्रीराम विश्रांती घेत होते त्याच झाडावर मारुती बसला, श्रीरामांचे लक्ष झाडावर जाताच वरील वानराला जन्मजात ब्रह्मचर्य-कौपीन असल्याचे त्यांनी बोलून दाखविले-३८३. त्यांचे कर्तृत्वाची कसोटी हनुमंत पाहातो, श्रीराम पडल्या पडल्याच शांतपणे मारुतीच्या शस्त्रात्रांचे निवारण करतात, मारुतीची धावपळ व वायूचा उपदेश, श्रीरामास मारुतीचा साष्टांग प्रणिपात, लक्ष्मणाचा संशय - ३८४ श्रीरामांचे लक्ष्मणास आश्वासन व मारुतीचे एकपिंडत्वाचे वृत्तकथन, हनुमंताला आनंद व सर्वांचे ऐक्य-३८५

अध्याय दुसरा

पृष्ठे ३८५ ते ३९०

### • सुग्रीवाची जन्मकथा •

हनुमंत सुग्रीवाचा जन्मवृत्तांत विचारतो, सुग्रीवाची शोचनीय अवस्था व इच्छा, मारुतीची भूमिका व श्रीरामांचे आश्वासन, श्रीरामांचा प्रश्न व वाली-सुग्रीवाचा वृत्तांत, ऋक्षाचा जन्म व बालक्रीडा-३८६ सरोवराला उमेचा शाप, शापित सरोवरात उडी मारल्यामुळे ऋक्षाला स्त्रीत्व प्राप्त तिला पाहून इंद्र व सूर्याचे कामोद्दीपन व त्यामुळे वीर्यस्खलन-३८७ 'वाला' मध्ये इंद्राचे वीर्य पडले म्हणून वाली हे नाव, मानेमध्ये (ग्रीवेवर) वीर्य पडले म्हणून सुग्रीव हे नाव, दोघा पुत्रांसह ऋक्ष स्त्रीवेषात ब्रह्मदेवाजवळ जातो, ब्रह्मदेवाची शापवाणी, ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून ऋक्षाची शापमुक्तता, वालीला पाहून इंद्राला आनंद व त्याला माला अर्पण, मालेचा प्रभाव व दुंदुभीचा वध, मालेची निर्मिती-३८८ सूर्याने केलेली सुग्रीव व मारुतीची संगती, दोन पुत्रांसह उपभोगासाठी ऋक्षाला राजधानी दिली. विश्वकर्म्याकडून किष्कींधानगरीची निर्मिती, ऋक्षास राज्याभिषेक व वालीला युवराजपदाची प्राप्ती, ऋक्षाच्या निधनानंतर वाली राजा होतो व सुग्रीव युवराज व नल सेनापती - ३८९

अध्याय तिसरा

पृष्ठे ३९१ ते ३९५

### • सुग्रीवाशी सख्य •

सुग्रीवाला स्नेहसंबंध जोडण्यासाठी श्रीराम पाचारण करितात, हनुमंत सुग्रीवाला श्रीरामांचा वृत्तांत सांगतो-३९०. सुग्रीवाला आनंद व त्याचे श्रीरामांकडे गमन, श्रीरामांजवळ सुग्रीवाची शरणागती, श्रीरामांनी आलिंगन देऊन स्वागत केले, रावणाने सीतेला पळवून नेल्याचे श्रीराम सुग्रीवाला सांगतात-३९१ सीतेने खाली टाकलेले अलंकार, सीतेचे आक्रंदन व मारुतीचे उड्डाण, रावणाचे लंकेत उड्डाण, ते अलंकार पाहून श्रीरामांना परम दुःख, सुग्रीवाकडून श्रीरामांचे सांत्वन, सीता शोधाचे आश्वासन व प्रतिज्ञा- ३९२ श्रीरामांची घोर प्रतिज्ञा, वालीचा पराक्रम व सुग्रीवाचे वर्णन, दुंदुभी दैत्याचा वध-३९३ दुंदुभीचा अतिप्रचंड देह, रावणाची दुर्दशा, रावणाला खेळणे म्हणून अंगदाच्या पाळण्यावर बांधला. पौलस्तीची याचना, त्यामुळे रावणाची मुक्तता, कश्यपमाळेमुळे वाली अजिंक्य-३९४ कश्यपाच्या मानासाठी वालीला लपून मारणे, श्रीरामांचे आश्वासन, सुग्रीवाला आनंद-३९५

## • वाली सुग्रीवाच्या वैराची मूळकथा •

दोघा बंधूंच्या कलहाच्या कारणासंबंधी श्रीरामांचा प्रश्न, सुग्रीवाकडून निवेदन, लोभाचा प्रभाव, पिताजींच्या निधनानंतर बंधूंचे सख्य - ३९५ दुंदुभीचा पुत्र मयासूर याचे युद्धास आव्हान, वाली व मी बाहेर आलो, मयासूर पळून गुहेत गेला, सुग्रीवाला दारातच राहण्यास सांगून वाली स्वतः गेला - ३९६ पंधरा महिने मी बाहेरच वाट पाहत बसलो. नंतर आतून आरोळ्या ऐकू आल्या व रक्ताचा प्रवाह आला, वाली ठार झाला असावा असे वाटून त्याच्या सूडासाठी निघणार होतो; तोच लोमशऋषींनी येऊन नगरीवर गंधर्वांनी आक्रमण केल्याचे सांगितले, त्या गुहेतून राक्षस बाहेर येऊ नयेत म्हणून मी शिळेने तोंड बंद केले, वालीला अखेर तिलांजलीही दिली, नंतर किष्किंधेला येऊन आक्रमक शत्रूंचा पांडाव केला-३९७ वालीचा वध झाला असे समजून सुग्रीवाला राज्याभिषेकही झाला, नंतर मयासुराला ठार करून वाली किष्किंधेत हजर झाला. सर्वांना संतोष व माझ्यावर वालीचा क्रोध. माझ्यावरील आरोप-३९८. गुहेच्या तोंडावर शिळा ठेवल्याबद्दल राग, सुग्रीव मेला असे समजून वालीचा शोक. वालीचा सुग्रीवावर दोषारोप, वालीची पत्नी तारा ही वस्तुस्थिती सांगून सुग्रीव निर्दोषी आहे असे आवर्जून सांगते - ३९९. तारेचे सांगणे न ऐकता सुग्रीवाच्या घाताला प्रवृत्त होतो. तारेची मध्यस्थी व सुग्रीवाचा राजधानीचा त्याग व प्रयाण, सुग्रीवाचे ते वृत्त ऐकून श्रीरामास अनुकंपा-४००.

अध्याय पाचवा पृष्ठे ४०१ ते ४०६

## • वालीकडून सुग्रीवाचा पराभव •

वालीच्या सामर्थ्याने सुग्रीवाला भीती, त्यामुळे सुग्रीव ऋष्यमूक पर्वताचा आश्रय घेतो. त्यासंबंधी शापाचे मूळ कारण-४०१. वैराचे मुख्य कारण वालीचा वध करण्याचे तीन पर्याय, दुंदुभीचा मृत देह डाव्या पायाच्या अंगठ्याने रामाने उडविला, परंतु शुष्क कलेवर उडविल्याने सुग्रीवाचे समाधान झाले नाही, रामाने बाणाने केलेले सात वृक्षांचे छेदन. त्यामुळे सर्वांना विस्मय व आनंद, श्रीराम सुग्रीवास वालीला युद्धाचे आव्हान देण्यास सांगतात- ४०२ सुग्रीवाचा भुभुःकार ऐकून वालीचे आगमन. दोघांचे घनघोर युद्ध- ४०३ दोघांत कमालीचे साम्य असल्यामुळे श्रीरामांस बाण सोडता येईना. बहुतकाळपर्यंत युद्ध झाल्याने सुग्रीव कश्यपमाळेपुढे मूर्च्छित, कष्टाने ऋष्यमूक पर्वतात पडला, सुग्रीव उद्विग्न व त्याचा रामांवर आरोप-४०४ वानरांचा संभ्रम, सुग्रीवाचा शोक व श्रीरामांस दूषण. रामाने कारणाचे स्पष्टीकरण करून सुग्रीवाची खात्री केली-४०५ सुग्रीवाचे समाधान व वालीशी युद्धाची ईर्ष्या. या वेळी राम खुणेसाठी सुग्रीवाच्या गळ्यात गजकमलमाला घालतात, सुग्रीवाचे उड्डाण व भुभुःकार, वालीला आव्हान-४०६.

अध्याय सहावा पृष्ठे ४०७ ते ४१३

## • वालीचा वध •

सुग्रीवाची गर्जना ऐकून वालीचा संताप, सुग्रीवाला रामांचे साहाय्य आहे तरी हे शत्रुत्व संपवावे असा तारेचा उपदेश. वालीचे तारेला उत्तर, रामांशी विरोध नाही- ४०७ तारेचे पुनः सांगणे की, सुग्रीव श्रीरामांचा शरणागत आहे म्हणून रामांचा विरोध: श्रीरामांशी सख्य केले तरच शांती व समाधान लाभेल, वालीचा प्रकोप-४०८ वालीची सामर्थ्याची प्रौढी. पुनः वाली-सुग्रीव युद्ध, सुग्रीवाला भूमीवर पाडला त्याच वेळी रामांनी वालीवर बाण सोडला-४०९ वालीला मूर्च्छा, सावध होऊन त्याने रामाचा अधिक्षेप केला. रावणाकरिता अधर्म का केला, श्रीरामांचे वालीला समर्पक उत्तर, त्यामुळे त्याचे परिवर्तन-४१०. स्वतःबद्दल वालीला पश्चात्ताप-४११ रामांची स्तुती करून वाली क्षमा मागतो. वालीची क्षमायाचना, श्रीरामांचे आश्वासन, वालीच्या पश्चात्तापामुळे रामाचा कळवळा, वालीचा देहत्यागाचा आग्रह-४१२. वालीच्या देहात रुतलेला बाण श्रीरामांनी काढला, त्याचे प्राणोत्क्रमण-४१३.

मारुतीने सर्व वानरांना पुच्छात बांधून प्राणरक्षणाकरिता पित्याचा धावा केला-४५१. श्रीरामभक्तांचे संरक्षण, हनुमंताला प्रकाश दिसतो, प्रकाशामुळे वानर सावध व हनुमंतस्तुती-४५२.

**अध्याय पंधरावा** पृष्ठे ४५२ ते ४५७

**• तापसी - हनुमंत संवाद •**

सावध झाल्यावर त्या वानरांना सभोवती सुवर्णभुवन दिसते. ते विवर सर्व समृद्धीने निर्मल जलप्रवाहांनी परिपूर्ण, त्या निर्जन प्रदेशात एक कुमारी तापसीचे दर्शन-४५२. हनुमंताचा तिला प्रश्न, त्या गुप्त विवरात आल्याबद्दल तिला आश्चर्य, श्रीरामनामाचा प्रभाव, तपःसामर्थ्याने तिला हनुमंताविषयी ज्ञान व आदर. तापसीची साद्यंत कथा, हैमदानवनिर्मितीचे स्थळ-४५३. मयासुराचे तप, ब्रह्मदेवाजवळ मरणरहित अवस्थेची याचना, विवरात मृत्यू येणार नाही असे त्याला वरदान, विवर गुप्त ठेवून तेथूनच असुरांच्या हस्ते देवांवर जारणमारणाचे आभिचारिक प्रयोग. ब्रह्मदेवाच्या सूचनेवरून त्याच्या प्रलोभनासाठी हेमा अप्सरेची नेमणूक-४५४ तिच्याबरोबर बाहेर आल्यावर इंद्राचा त्याच्यावर वज्राघात, ब्रह्मदेवाने सुवर्णमय भुवन तिला दिले, सुवर्णमनूची स्वयंप्रभा नावाची कन्या, ब्रह्मदेवाच्या कृपेने निष्काम अनुष्ठानाचे तिला वरदान, श्रीरामभक्तांशिवाय येथे कोणी येणार नाही अशी वरप्राप्ती. हेमा सकाम तपस्येने स्वर्गास गेली, भुकेल्या वानरांसाठी आहाराची याचना, दानाचे प्रकार, स्वयंदान अत्युत्तम-४५५ तापसीने स्वतः फळे आणून वानरांना दिली, फळांचे अंतर्दृष्टीने वर्णन-४५६. वानरांची तृप्ती, बुभुक्षितांना अन्नदान, सर्व दानाहून श्रेष्ठ -४५७.

**अध्याय सोळावा** पृष्ठे ४५७ ते ४६३

**• संपातीचा उद्धार •**

फळांनी व पाण्याने वानरांची तृप्ती. यानंतर सर्व वानरांची परत जाण्याची इच्छा-४५७ तापसीच्या प्रश्नावरून कार्याविषयी निवेदन. विवराबाहेर जाण्याची उत्कंठा-४५८ त्या तापसीच्या सांगण्यावरून सर्व वानरांनी डोळे झाकले, नेत्र उघडल्यावर समोर विशाल समुद्र. शोध करतात तो तापसी व विवर अदृश्य, एक महिन्याचा अवधी संपला, परत जाऊन सुग्रीवाचा अपमान होईल म्हणून तेथेच बसून प्रायोपवेशन-४५९. समुद्रतीरावर बसले असता संपातीची भेट, संपातीचा त्यांना प्रश्न, अंगदाकडून उत्तर, वृत्तांत कथन व स्वयंदान, वृत्तांत ऐकून संपातीचे हृदयपरिवर्तन, रामनामाचा महिमा, रामांचा व वानरांचा संबंध संपाती विचारतो-४६०. वानरांना आश्चर्य, हनुमंताचा प्रश्न. संपाती हा जटायूचा बंधू, तारुण्यातील पराक्रम, संपातीचे पंख जळून त्याची असहायता, अरुणास सूर्याचे वरदान-४६१. संपातीने विचारल्यावरून हनुमंत जटायूचा वृत्तांत सांगतात-४६२.

**अध्याय सतरावा** पृष्ठे ४६४ ते ४७०

**• हनुमंताचे समुद्रावरून उड्डाण •**

संपातीकडून सीतेची माहिती मिळाल्यामुळे वानरांना आनंद-४६४. अंगदाच्या प्रश्नावरून वानरांचा पराक्रम, जांबवंताचा पराक्रम-४६४. बलकथन नल, नीळ, जांबवंत वीर्यकथन, जांबवंत हनुमंताची स्तुती करतो, मारुतीचे उड्डाणकथन-४६५. वानरांना आनंद व हनुमंताचे उड्डाण-४६६. उड्डाणाची प्रतिक्रिया, समुद्रलंघनाचे कौतुक पाहाण्यासाठी देवादिकांचा मेळावा जमला, उड्डाणाचे वर्णन, हनुमंताच्या विश्रांतीसाठी जळातून वर यावे अशी सागराची मैनाद्रीला विनंती-४६७. सागराच्या सांगण्यावरून मैनाद्री वर येतो मैनाद्री व हनुमंत यांची उंच होण्याची स्पर्धा, मैनाद्रीची हनुमंताला प्रार्थना-४६८ हनुमंताचे उत्तर तरीही मैनाद्रीचे हनुमंताला विश्रांतीस आमंत्रण, मैनाद्री पर्वताच्या मनःशांतीकरिता त्याला अंगुलीचा स्पर्श व

त्याचा परिणाम, हनुमंताच्या सामर्थ्याची परीक्षा पाहाण्यासाठी दनूला पाठविली-४६९. दनू व हनुमंत संघर्षात हनुमंताची सुटका व त्याचे पुढे प्रयाण-४७०.

**अध्याय अठरावा** **पृष्ठे ४७१ ते ४७६**

**• हनुमंताचा लंकाप्रवेश •**

हनुमंताच्या उड्डाणात सिंहिकेचे विघ्न, तिच्या पोटात शिरून तिचे उदर विदारण व नाश-४७१. मारुतीचा पराक्रम व चातुर्य-४७२. पुढे उड्डाण करून पडलंकेस आगमन. घर्घर राक्षसाची पत्नी व रावणाची बहीण क्रौंचा राणी, क्रौंचा व हनुमंत यांचा संघर्ष -४७३. तिचे काळीज बाहेर काढून तिच्या पोटात पुच्छ खुपसून तिचा नाश, पडलंकेच्या उड्डाणाला कालिका खंडाचा आधार, सर्व नगरीच्या नाशातून एक वृद्धा जिवंत राहिली, तिच्याकडून माहिती घेऊन हनुमंताचे लंकेकडे गमन-४७४. रावणाचा विजयध्वज उपटून लंकेत फेकला-४७५

## सुंदरकांड

**अध्याय १ ते ४२**

**अध्याय पहिला** **पृष्ठे ४८५ ते ४९०**

**• लंकेचा शोध •**

श्रीरामनामाचा महिमा-४८५. लंकेच्या उच्च भागावर बसून मारुती पुढील बेत करतो, लंकावर्णन व तिचे अभंगत्व, वानररूप किंवा राक्षसरूप घेऊन कार्य पार पाडणे कठिण-४८६. म्हणून अत्यंत सूक्ष्म रूपाने लंकेत प्रवेश, ब्रह्मराक्षसांची वसती, शैवदीक्षा, त्रिपुंडधारी वगैरे विविधजाती. अग्निहोत्री, क्षत्रिय इत्यादींची घरे शोधिली-४८७. व्यवहारी. तेली-साळी-४८८. तांबोळी, शिंपी, रंगारी, वेदपाठक, शास्त्री-पंडित, ज्योतिषी, सर्व लोकांमध्ये-४९८ सर्व स्थळे शोधून हनुमंताचे पुढे गमन-४९०.

**अध्याय दुसरा** **पृष्ठे ४९० ते ४९५**

**• सीतेचा शोध •**

नगरशोध केल्यानंतर राजवस्तीत हनुमंत जातो, मारुती उड्डाण करून प्रहस्त, प्रधानादिकांची घरे शोधितो-४९०. ही सर्व घरे पाहात असता दृष्टीसमोर आलेले घरातील एकांत प्रसंग, त्यामुळे उद्विग्न. ही रतिप्रसंगाची दृश्ये ब्रह्मचर्याविघातक म्हणून मारुतीचा उद्वेग-४९१. इंद्रजिताच्या भुवनात, भुवनवर्णन सुलोचना दर्शन- ४९२ सीतेचा भास व संताप, सुलोचना-इंद्रजित यांचा संवाद. हनुमंताची खात्री, कुंभकर्ण भुवन-४९३ निद्रेचा प्रभाव, बिभीषणाचे घर-४९४.

**अध्याय तिसरा** **पृष्ठे ४९५ ते ४९९**

**• रावणसभेवर मारुतीचा पुच्छप्रयोग •**

बाजारपेठा, बिभीषणाचे मंदिर पाहूनही सीतेचा शोध लागला नाही. मारुतीची अभिनव योजना, स्वतः गुप्त राहून शेपटीच्या साहाय्याने सर्वत्र कलह माजविला, घरोघरी पाणी साठलेल्या घागरींची आपटाआपट व स्फोट, सीतेला लंकेत आणल्यामुळे हा प्रसंग आला अशी नागरिकांची ओरड-४९५. राजभवनाकडे जाणाऱ्या मानकऱ्यांवर शेपटीचा प्रयोग, अश्वारूढ, गजारूढ, रथारूढ व शिबिकेतील स्वारांची दैना, दुर्दशा. इतर मानकऱ्यांवरही त्याप्रमाणेच प्रयोग-४९६. मल्लांचा संघर्ष, वारेवाले, वाजंत्री, वेदपाठक व इतर. रावणाच्या सभेत हेरांचा वृत्तांत. सर्व ठिकाणी अंधार, पूर्वीच्यांनी दुर्लक्ष केल्याचा परिणाम-४९७. अशा वार्ता आणील त्यास कडक शासन, मारुतीचा सभास्थानावर प्रयोग, दिवे विझविणे. त्याचा परिणाम म्हणून सर्वत्र अंधार, गोंधळ, सीता पळविण्याचे गंभीर परिणाम, रावणाचा

मुकुट ओढून खाली पाडणे, त्याच्या मस्तकावर आघात-४९८. दिवे लागल्यावर दृष्टीस पडलेले विचित्र दृश्य-४९९.

पृष्ठे ४९९ ते ५०४

**अध्याय चौथा**

**• रावणाच्या शयनभवनात सीतेचा शोध •**

प्रयत्नाची पराकाष्ठा करूनही सीतेचा शोध लागत नाही -४९९ त्यामुळे हनुमंताची चिंता, सीतेने देहत्याग तर केला नसेल, किंवा तिला रावणानेही भक्षण केली असेल किंवा त्याच्या पत्न्यांनीही, मारुतीचे दुःख, त्या वार्तेचा परिणाम, गुरूजवळ विकल्परहित सर्व सांगावे-५००. या वार्तेचा परिणाम, सूर्यवंश व वानरवंश नष्ट होतील, बरे मी येथेच राहणे योग्य नाही, त्याचे परिणाम, हनुमंताचा शोक व श्रीरामांचा धावा, त्यामुळे मारुतीस आल्हाद व आत्मविश्वास, प्रयत्नांची प्रशंसा व फळ -५०१. हनुमंतास उत्साह व पुढील कामाचा बेत, पुढील प्रयत्नांशी दिशा व निश्चय, हनुमंताचा सूक्ष्म रूपाने रावणभवनात प्रवेश, तेथील वर्णन, कामग विमान-५०२. रावणाचे स्वतःचे भुवन, त्याचे शयनमंदिर व तेथील स्त्रिया, त्यांची स्थिती, रावणाच्या शय्या-५०३. मंदोदरीचे दर्शन, तीच सीता असा मारुतीचा समज व त्यामुळे झालेली मनःस्थिती, सभेतील विघ्नाबद्दल रावणाचे शांतिकर्म-५०४.

पृष्ठे ५०४ ते ५०८

**अध्याय पाचवा**

**• मारुतीला अशोकवनात सीतेचे दर्शन •**

रावणाचा शांतिहोम, मंदोदरीलाच सीता समजून हनुमंताचे विचार व मनोविकार-५०४. होम समाप्तीनंतर मंदोदरी रावणाची पूजा करिते, ते दृश्य पाहून मारुतीचा क्षोभ, अविचार करण्यापूर्वी खरे काय आहे ते ठरविण्याचा निश्चय-क्रोधाचे परिणाम, दोघांचा संवाद, मंदोदरीला पडलेले वाईट स्वप्न-५०५. रावणाकडून मंदोदरीचे सांत्वन, मंदोदरीची प्रार्थना, त्या संवादात सीतेचा पत्ता लागल्याने मारुतीला आनंद व पुढील बेत, सीतेच्या नामोच्चारामुळे रावणाचा चित्तक्षोभ, रावणाने योजलेली युक्ती-५०६. आपल्या दासीला पाठविले, त्या दूतिकेच्या मागून मारुती गेला. सीता व अशोकवन. सीतेच्या दर्शनाने मारुतीला झालेला हर्ष-५०७.

पृष्ठे ५०८ ते ५१३

**अध्याय सहावा**

**• मंदोदरीची जन्मकथा •**

सीतेची देहस्थिती, काया-वाचा-मनाने भजनभक्ती, अनन्यता, याप्रमाणे मारुतीला सीता दिसली, त्याचे कारण -५०८. मंदोदरी हीच सीता असा हनुमंताला भास का झाला, मूळ कथानक, कैकसीची लिंगपूजा, शिवरात्रीला ती ध्यानस्थ बसली असता इंद्राने शिवलिंग समुद्रात टाकले, कैकसीचा आक्रोश, रावणाचे आश्वासन, कैकसीचे त्याने समाधान, आत्मलिंगासाठी रावण कैलासाला जातो, शंकराचे दुर्लक्ष- ५०९. शृंगीच्या झणत्कारात शिव तल्लीन, रावणाचे मस्तक समर्पण व गायन, त्यामुळे प्रसन्न होऊन शंकरांचे वरदान, रावणाला दहा शिरे, वीस भुजा व अमृतकुपीचा लाभ, शंकर रावणाचे इच्छित देण्यास तयार, पार्वती व आत्मलिंग रावण मागतो, शंकरांना आश्चर्य ! शब्द देऊन बसल्यामुळे दोनही वर देतात, आत्मलिंगासंबंधाने शंकरांचा इशारा, दोन्ही घेऊन रावण जातो. उमा विष्णूंचा धावा करते-५१० पार्वतीची सुटका करण्यास महेश व कुमार यांची असाहाय्यता, विष्णूची व या दोघांची भेट, विष्णू धर्मऋषी, कुमार शिष्य व गणेश गोपाल होतात, शिष्य रावण यांचा संवाद, उमेची विकृती व रावणाचा उद्वेग, रावणाची शंकराकडे धाव, विष्णूने केलेली मंदोदरीची उत्पत्ती, मंदोदरी शब्दाची व्युत्पत्ती. विष्णू ती पुतळी शिवाच्या आसनाखाली घालतात, रावणाचा क्रोध व अधिक्षेप व शिवाची प्रतिक्रिया -५११

अध्याय अकरावा | पृष्ठे ५३३ ते ५३८

**• सीता व मारुती यांची प्रथम भेट •**

पूर्वीच्या घटनांचे स्मरण होऊन सीतेचा अनुताप - ५३३. झाडावरून मारुती श्रीरामांची अंगठी टाकतो, त्याचा सीतेवर विलक्षण परिणाम-५३४. जानकीचे अवलोकन व तिचे मुद्रिकेशी संभाषण-५३५. सीतेला मूर्च्छा आली, त्यामुळे मारुती घाबरला-५३६. मारुतीने श्रीरामवृत्तांत कथन केला, श्रीरामगुणसंकीर्तन एकून सीता सावध होते व मुद्रिका आणणाऱ्याला भेटीस बोलाविते. मारुतीने खाली उतरून सीतेला साष्टांग वंदन केले, मारुतीचा आनंद व सात्त्विक भाव-५३७. सीतेच्या मनात शंका, मारुती हा दूत की मायावी राक्षस? पूर्ववृत्तांत जाणून घेण्याची इच्छा -५३८.

अध्याय बारावा | पृष्ठे ५३८ ते ५४४

**• सीता-हनुमंत यांचा संवाद •**

सीता मारुतीला पूर्ववृत्तांत कथन करण्याची सूचना करिते-५३८ रामकथाश्रवणाचे फळ, हनुमंताचे कथन, श्रीरामवर्णन-५३९. श्रीरामदर्शनाचे फळ, लक्ष्मणाचे वर्णन. ते ऐकून त्याचा सीतेवर परिणाम, रामलक्ष्मणाचे क्षेमकुशल ऐकून सीतेला झालेला आनंद, सीता हनुमंताची स्तुती करते-५४० मारुतीराय सीतेजवळ खूण मागतात. किंवा पाठीवर बसून येण्याचे सांगतात-५४१. मार्गात अडथळे किंवा अपघात होण्याची भीती सीता व्यक्त करते. मारुतीचे उत्तर व सीतेची शंका. मारुतीचे शेपटीच्या प्रभावाचे वर्णन व अभिवचन, श्रीरामांशिवाय अन्य पुरुषांचा स्पर्श वर्ज, मारुती सीतेला आपली व श्रीरामांची जवळीक सांगतात-५४२. आणि स्वतःचे गुप्त रहस्य सीतेला सांगतात, सीता विचारते की, श्रीरामांची आज्ञा काय आहे? हनुमंताचे उत्तर व सीतेचा त्याला निरोप-५४३ सीता मारुतीला खुणेचा मणी देते व लक्ष्मणाला क्षमा करण्यास कळविते-५४४.

अध्याय तेरावा | पृष्ठे ५४४ ते ५४९

**• हनुमंताकडून वनविध्वंस •**

मणी पाहून श्रीरामांना पूर्वीच्या गोष्टींचे स्मरण होईल ते सीता सांगते-५४४. खूण स्वीकारल्यावर कुरापत काढावी म्हणून मारुती सीतेची आज्ञा मागतात, पुढील परिणामांचे गंभीर स्वरूप ओळखून सीतेचा अनिश्चय-५४५. मारुतीच्या उद्वेगाचा आविष्कार, सीतेला कळवळा व भूक निवारण्याची आज्ञा, मारुतीचा आनंद, पुढील कार्याचा विचार व प्रारंभ, विशेष वर्णन-५४६. रक्षकांची गडबड व त्यांना समुद्रात बुडविले, राक्षसी याबद्दल सीतेजवळ चौकशी करतात-५४७. सीतेचे उत्तर, हनुमंताची डरकाळी ऐकून राक्षसींची तारांबळ, रावणाकडे वृत्तांत निवेदन, त्यामुळे रावणाचा क्षोभ व प्रतिकारासाठी सैन्याची योजना-५४८. मारुतीने सर्व सैन्याचा विध्वंस करून रावणाकडे निरोप धाडला-५४९.

अध्याय चौदावा | पृष्ठे ५४९ ते ५५५

**• रावणपुत्र अखयाचा मारुतीकडून वध •**

ऐंशी हजार किंकर, चौदा हजार बनकर व संपूर्ण वनाचा मारुतीने विध्वंस केला म्हणून रावणाचा संताप-५४९ युद्धातून माघारी आल्यास अपमान करण्याची धमकी देऊन प्रहस्त प्रधानाचा पुत्र जंबुमाळी याला पाठविला-५५०. द्वंद्वयुद्धात जंबूच्या परिघानेच त्याचा घात. जंबुमाळीच्या मातांचा आक्रोश-५५१. मारुतीवर सर्वांकडून एकत्रित प्रहार, त्या सर्वांना पुच्छात गुंडाळून त्यांचा एकदम अंत, लंकेत विलाप. रावणाचा संताप, यूपाक्ष, विरूपाक्षादि पाच प्रमुख सेनापती मारुतीवर रावणाने धाडले-५५२ त्या पाचही सेनानींनी पाच बाजूंनी हल्ला केला, मारुतीने पाचांनाही शेपटीने आवळून एकदम ठार केले. त्यानंतर भुभुःकार करून मारुती मंदिरावर बसला, रावणास कळल्यावर आपला पुत्र अखया कुमाराची योजना-५५३ प्रधानादिक सर्व आप्तस्वकीयांचा असंतोष, अखयाशिवाय दुसऱ्याला पाठविण्याची विनंती. मारुती आणि आकाशात युद्ध-५५४ मारुतीने शेपटीच्या साहाय्याने अखयाचा रथ, ध्वज, सारथी यांचा नाश केला, अखयास धरून गरगरा फिरवून शिळेवर आपटला, त्यातच त्याचा अंत झाला-५५५.

अध्याय विसावा पृष्ठे ५८५ ते ५९०

**• हनुमंताचे सीतेला आश्वासन •**

रावणाचा अपमान करून व लंका जाळून मारुती परतला. त्याच्या मनात चाललेले विचार. उल्लसित वृत्ती, सागराला त्रास होऊ नये म्हणून पुच्छ लहान करून दाहशमन-५८५. त्या वेळी आलेला घामाचा थेंब समुद्रात पडून मगरीच्या पोटात गेला, मकरध्वजाची उत्पत्ती, मारुतीचे पुच्छ पेटवून त्याला जाळला असे राक्षसी सीतेला सांगतात. सीतेचे दुःख,लंका जाळून मारुती परत गेला अशी वार्ता सरमा सीतेला सांगते, सीतेला आनंद-५८६. लंकेच्या आगीत सीताही भस्म झाली असा मारुतीचा समज, त्यामुळे हनुमंत उद्विग्न. क्रोधाचा प्रभाव व त्याची निंदा, क्रोधावर विजय मिळविणाऱ्या पुरुषांना धन्यवाद-५८७, काय करावे त्याचा निश्चित विचार. सीता भस्म होणारच नाही असा आत्मविश्वास, सीता दग्ध झाल्यास अग्नीला दंड करीन, वायूच्या आश्वासनाने मारुतीला स्वास्थ्य, पुनः लंकेत जाऊन सीतेचे दर्शन-५८८. सीतेला आनंद व तिची विश्रांती घेऊन जाण्याची सूचना, मारुतीचे एकमेव विश्रांतिस्थान श्रीरामचंद्र, सीतेला आनंद, वानर समुद्र उल्लंघन कसे करतील, सीतेची शंका-५८९ हनुमंताचे आश्वासन, रामाच्या कर्तृत्वावर विश्वास. सीतेला नमस्कार करून उड्डाण, सीतेला गदगदून आले, मारुतीचा आदेश, श्रीरामचरणी लीनता ठेवावी-५९०.

अध्याय एकविसावा पृष्ठे ५९० ते ५९७

**• गजेंद्राचे आख्यान •**

लंकादहनाचा परिणाम-५९० गजेंद्र उद्धाराचे आख्यान. श्रीशुकांनी परीक्षितीला आख्यान सांगितले, त्रिकूट पर्वतावर गंडकीगिरीत सरोवर आहे-५९१. त्या सरोवरात मोठा नक्र (सुसर).होता आणि त्या वनातही हत्ती होता, ते दोघेही ब्रह्मशापाने त्या योनीत गेले. राजा इंद्रद्युम्न व हू हू गंधर्व नक्र झाला-५९२ गर्वाचे प्रकार व परिणाम, साधूंच्या उपेक्षेचे परिणाम, हू हू गंधर्व सरोवरात क्रीडा करीत असता ऋषींच्या पायांस झोंबल्यामुळे नक्र झाला. दोघेही ऋषींना शरण गेल्यावर उःशाप मिळाला की त्यांचे द्वंद्वयुद्ध जुंपल्यावर भगवंत करेल दोघांचा उद्धार-५९३. गजेंद्र सरोवरात गेला नाही. उन्हाळ्यात आपल्या सहकाऱ्यांसह वनातून विहार करीत असता तहानेने व्याकूळ होऊन गजेंद्र सरोवरात आला-५९४. सोंडेने उदक घेताना नक्राने ती पकडून आघातांनी रक्तबंबाळ केली-५९५ दोघांची झटपट झाली. हजार वर्षे युद्ध झाल्यावर गजेंद्र हतबल झाला व त्याने प्रभूचा धावा केला-५९६.

अध्याय बाविसावा पृष्ठे ५९७ ते ६०६

**• गजेंद्र उद्धार व हनुमंताचे श्रीरामदर्शनार्थ पुनरागमन •**

श्रीकृष्ण व श्रीरामचंद्र यांच्यातील अवतारसाम्य व तुलना. नाममहिमा-५९९. गजेंद्राच्या प्रार्थनेमुळे भगवंताचे आगमन व याचा उद्धार-६००. नक्राच्या प्रार्थनेवरून त्याचाही उद्धार-६०२. गरुड येताच त्याच्या क्षुधानिवारणाठी त्या दोघांचे देह त्याला दिले, इतक्यात भ्रुभंग पक्ष्याने दोन्ही प्रेते पकडली-६०३. गरुडाने तिघांना धरून उड्डाण केले, कनकजांबूच्या विनंतीने गरुडाचे शाखारोहण, तो बसल्यावर शाखा कडाडली, त्यावरील साठ सहस्र वालखिल्यऋषींना पीडा होऊ नये म्हणून गरुडाचे अधांतरीच राहणे, गरुडाने प्रभूचा धावा केल्यावर कश्यप ऋषींचे दर्शन- ६०४. कश्यपांच्या विनंतीवरून वालखिल्यऋषी फांदी सोडून बदरीला गेले, कश्यपांनी सुचविल्याप्रमाणे गरुडाने सुवर्णशाखा लंकेच्या पठारावर टेवली-६०५. कुबेराकरिता लंका शहराची निर्मिती, हनुमंताच्या लंकादहनात सुवर्ण शाखेचे दहनाने लंका सुवर्णमय झाली-६०६.

अध्याय त्रेविसावा पृष्ठे ६०६ ते ६१२

**• सीतेचा शोध करून हनुमंताचे आगमन •**

लंकादहन झाल्यावर सीतेची आज्ञा घेऊन मारुती परत येण्यास निघाला -६०६. अरिष्ट पर्वतावरून

उड्डाण, त्या दडपणामुळे पर्वत जमीनदोस्त झाला, भगवद्भजनमहिमा-६०७. व अशा रीतीने अरिष्ट पर्वत परब्रह्मी प्रवीष्ट झाला, त्याचा व या कथेचा संबंध, मारुतीच्या उड्डाणाचा नाद ऐकून महेंद्र पर्वतावरील वानरांना हर्ष-६०८. सर्व वानरांकडून स्वागत-६०९. वानरांचा हर्षातिरेक, हनुमंताची भेट, अंगदाची वृत्त निवेदन करण्याची विनंती-६१०. हनुमंताचे संक्षेपाने कथन. हनुमंताच्या शरीरावर शस्त्रांचे घाव दिसल्यावरून जांबुवंत युद्धाचा वृत्तांत विचारतात-६११. स्वतःचा पराक्रम स्वमुखाने वर्णन करणे अप्रशस्त म्हणून हनुमंताचे विनंतीवरून ब्रह्मदेवाने पराक्रम वर्णनाचा लेख लिहिला. त्याचा अर्थ कळणार नाही म्हणून त्याचे वाचन श्रीरामांशिवाय करणे अयोग्य म्हणून तो तसाच ठेविला-६१२.

**अध्याय चोवीसावा**

**पृष्ठे ६१२ ते ६१८**

**• वानरांकडून मधुवनाचा विध्वंस •**

हनुमंताने सांगितले सीतेच्या तेजाने रावण भस्मप्रायच झाला आहे, ते ऐकून अंगदास स्फुरण चढले स्वतःच सर्वांचा संहार करून यावे असे तो सुचवितो. आपला कालातिक्रम झाला आहे, तेव्हा अपमान करून घेण्यापेक्षा कार्यपूर्ती करून जाणे केव्हाही चांगले, त्यावर जांबुवंताचे म्हणणे की, श्रीराम व सुग्रीवाच्या आज्ञेचा भंग करता येत नाही-६१३ हाच विचार हनुमंतानेही केला असावा. जांबवंताचे सूचनेप्रमाणे वानर परत जाण्यास निघाले, मार्गात मधुवनाचा सुगंध आल्यावर वानरांची मधुपानाची इच्छा-६१४ जांबवंतादि वानरमंडळींची हनुमंताकडून अंगदास विनंती. अंगदाची तत्काळ संमती, अनुज्ञा मिळताच वानरांना हर्षोन्माद व अंगदास धन्यवाद, वनरक्षकांना घालवून मनसोक्त मधुपान-६१५ यथेच्छ क्रीडाविहार. वनाधिपती दधिमुखाकडे वनरक्षकांचे गाऱ्हाणे, त्याचा संताप व सैन्यासह आक्रमण. दधिमुखाने फेकलेल्या साल वृक्षाचाच प्रत्याघात करून त्याचा पाडाव. सावध झाल्यावर सुग्रीवाकडे जाऊन गाऱ्हाणे, ते ऐकून सुग्रीव सर्व वृत्तांत विचारतो-६१६. ते वृत्त ऐकून वानरांनी सीतेचा शोध केला असावा असे लक्ष्मण व सुग्रीव यांनी ताडले-६१७. त्याशिवाय जांबवंतासारख्या मंत्र्याकडून असा अत्याचार होणे नाही, हनुमंताला न विचारताच आघात केल्याबद्दल त्यालाच दोष दिला, दधिमुख व अंगद यांचे परस्पर समाधान व श्रीरामदर्शनास प्रयाण-६१८.

**अध्याय पंचविसावा**

**पृष्ठे ६१९ ते ६२४**

**• श्रीराम-अंगद संवाद •**

दक्षिण दिशेला गेलेले वानर कालमर्यादा संपल्यावरही परतले नाहीत म्हणून श्रीरामास चिंता वाटेल तेव्हा हनुमंत आधीच येऊन श्रीरामांना भेटला. दुरूनच श्रीरामचंद्रांस सीताशुद्धी व तिच्या स्थितीचे कथन -६१९. श्रीरामांचा आनंद व हनुमंताचे अभिनंदन कौतुक-६२०. सर्व वानरांचे आगमन व श्रीरामांस वंदन. अंगदाचे कौतुक-६२१ रामांच्या सूचनेवरून अंगद वृत्तांत सांगतो-६२२. संपातीची भेट व हनुमंताचे लंकेकडे उड्डाण-६२४.

**अध्याय सव्विसावा**

**पृष्ठे ६२५ ते ६२९**

**• हनुमंतप्रतापवर्णन •**

ब्रह्मदेवलिखित हनुमंताचा लंकेतील पराक्रम-६२५. सुरसा हनुमंत संघर्ष व हनुमंताच्या हुशारीने मुक्तता, मैनाक पर्वताला अंगुलीने स्पर्श केला-६२६ सिंहीका-विदारण व पडलंकेचा विध्वंस. लंकेतील दिवे विझवून हाहाकार, इंद्रजित, कुंभकर्ण, बिभीषणादिंची घरे शोधिली, रावण शयनभवनातील वृतांत, रावण व मंदोदरी यांच्यातील संवाद-६२७. वृत्तांत ऐकून श्रीरामांना आनंद-६२८.

**अध्याय सत्ताविसावा**

**पृष्ठे ६२९ ते ६३४**

**• हनुमंत पराक्रम वर्णन •**

ब्रह्मदेवाने लिहिलेल्या पत्राचे वाचन, गुप्त राहून हनुमंताने केलेला हलकल्लोळ-६२९. दिवे मालवून सर्वत्र अंधार परिणाम-६३०. रावणावर प्रहार व स्पष्ट ताकीद, श्रोत्यांचा हर्ष, हनुमंत अशोकवनात

भेटून त्याला पाशबद्ध होण्यास सांगतो-६५६. राक्षसाच्या हातून केव्हाही बांधला जाणार नाही असे मारुतीचे उत्तर, इंद्रजिताला स्वतः व रावणाविषयी चिंता, ब्रह्मदेवाचे स्मरण व आगमन. इंद्रजित-ब्रह्मदेव संवाद, ब्रह्मपाशात मारुती बांधला जाईना, इंद्रजिताने फेकलेला पाश मारुती झुगारतो- ६५७. ब्रह्मदेवाचा इंद्रजितावर दोषारोप; ब्रह्मदेव मारुतीला विनवून पाशबद्ध करतो. राक्षसांना आनंद व मारुतीवर सर्वांचे प्रहार-६५८ हनुमंताचे पुढील कार्याविषयी विचार, रावणासमोर नेल्यावर त्याचा क्रोध. रावणाचा खड्गप्रहार निष्फळ, रावणाचा मारुतीकडून धिक्कार, रावणाची चिंता-६५९. नंतर रावणापुढे मारुतीच्या चेष्टा व अवहेलना, रावण त्यास त्याची माहिती विचारतो, मारुतीचे उत्तर. त्यामुळे इंद्रजितास कंप-६६० त्याला व बिभीषणाला रावणाविषयी चिंता, रावणाच्या शिरावर मारुतीचा नखाग्रांनी आघात. मारुती धिक्कार करतो-६६१.

अध्याय तेहतिसावा — पृष्ठे ६६२ ते ६७०

## • हनुमंतप्रतापवर्णन •

रावणासमोर मारुती पुच्छासन मांडून बसतो. रावण भयभीत होतो, बिभीषण व इंद्रजित रावणास सूचना करितात. रावणास चिंता, त्यांची सूचना अमान्य, मारुतीचा कपटाने घात करावा अशी योजना, मारुतीची स्तुती करून रामाची शपथ घालून मरण विचारतो, आपण अमर असल्याचे मारुती सांगतो, रावणाचा अविश्वास, मारुतीचे प्रत्युत्तर व रावणाची निंदा-६६२ पुच्छाचे दहन झाले तरच मरण असे मारुती सांगतो, ते कसे करावे असे रावणाने विचारल्यावरून वस्त्रे गुंडाळून तेल, तूप शिंपणे हा मार्ग मारुती सांगतो. वस्त्रांकरिता नागरिकांना नग्न केले, जनानखान्यातही आक्रमण केले तरी पुच्छ मोकळेच-६६३. सीतेचे वस्त्र आणण्याचा विचार करताच पुच्छ गुंडाळले गेले. पुच्छ पेटवण्यासाठी भात्याची योजना, अचेतन भात्याने सचेतन पुच्छ कसे पेटणार? तरीही ते पुच्छ पेट घेईना म्हणून मारुतीच्या सूचनेप्रमाणे रावण फुंकर घालू लागला-६६४ तेव्हा भडका उडून रावणाच्या दाढीमिशा जळाल्या. रावणाने तोंड वर करताच पुच्छही वर झाले हा वृत्तांत ऐकून राम, लक्ष्मण व सुग्रीवादि सर्वांना हसू आले व वानरसमूहात हनुमंताचा जयजयकार मारुतीचे रामचरणी वंदन व स्तुती, पुच्छाने केलेले वंदन, ते सप्तपाश तोडून मारुती मोकळा होतो-६६५. नाममहिमा, रामरक्षेचा प्रभाव, मारुती मेल्याचे सोंग करतो, राक्षसांचा त्यामुळे हर्ष, मारुती मेला या वार्तेने त्याला पाहण्यासाठी प्रचंड गर्दी-६६६. गर्दी पाहताच त्या पेटत्या शेपटीने एकदम आक्रमण केले. शेपटीने रस्तेच बंद केल्यामुळे एकच त्रेधातिरपट, हनुमंत राजद्वारी जातो, रावणाने मारुतीस विचारल्यावरून हा शेपटीचा परिणाम आहे असे त्यास सांगतो, मारुतीचे सर्व लक्ष राज मंदिराकडे वळले. घराघरांतून पुच्छप्रवेश व दाह-६६७. नागरिकांची दैन्यावस्था, शेपटीने वाट अडविल्यामुळे कोंडमारा, लंकेभोवती रक्षक असलेले राक्षस जाळले, रावणाच्या निवासस्थानावर आक्रमण-६६८. सर्व वीरांचा मारुतीवर एकवटून हल्ला, परंतु सर्व व्यर्थ, याप्रमाणे मारुतीचा पराक्रम झाला-६६९

अध्याय चौतिसावा — पृष्ठे ६७० ते ६७६

## • श्रीरामांचे समुद्रतीरावर आगमन •

लंकेतील हनुमंताच्या विक्रमाचे सिंहावलोकन-६७०. ब्रह्मलिखित पत्रश्रवणाने श्रीरामांस आनंद मारुतीस आलिंगन, रामांनी केलेली हनुमंताची प्रशंसा, हनुमंताकडून श्रीरामनामास्तवन -६७१. श्रीरामांना लंकादुर्गाविषयी माहिती, निर्मिती व संरक्षणाची व्यवस्था-६७२. लंका दहनामुळे दुर्ग घेणे सोपे झाले, समुद्रापलीकडे जाण्याची योजना, विजयादशमीच्या मुहूर्तावर प्रयाण करण्याचा सुग्रीवाचा आदेश-६७३ सर्व वानर वीरांना आनंद व सैन्य रचना-६७४. हनुमंतावर श्रीराम व अंगदावर लक्ष्मण आरूढ होऊन त्यांचे दक्षिणेला प्रयाण, मार्ग शोधण्यास व रस्ते करण्यासाठी सैनिक पाठविले-६७५. न थांबता जाण्याचा आदेश, विंध्याद्री, मध्याद्री व विविध वने-उपवने उल्लंघून समुद्रतीरावर आगमन, रामसेना व सागर यांची तुलना-६७६.

अध्याय पस्तिसावा पृष्ठे ६७७ ते ६८४

**• विभीषणाकडून रावण व प्रधानांची निर्भत्सना •**

श्रीराम व वानरसैन्य समुद्रतीरावर आले, कैकसी भिभीषणाकडे जाऊन रावणाची अपकृत्ये व त्याचे घोर परिणाम त्याला सांगते-६७७. कैकसी बिभीषणाला रावणाला उपदेश करण्यासाठी पाठविते. बिभीषणाची तयारी व रावणाने घात केल्यास तत्काळ श्रीरामांकडे जाण्याची तयारी. कैकसीची अनुज्ञा व वंशरक्षणावद्दल आशीर्वाद, बीभीषण रावणाकडे जातो, सभेत रावण त्याचे स्वागत करून त्याला अर्धासनावर बसवितो. बिभीषणाचे रावणाशी भाषण. लंकेची स्थिती- ६७८. सीता चोरून आणल्याची लंकेवर प्रतिक्रिया व पुढील कार्याविषयी सूचना, रावणाचा प्रधानांवर राग व प्रधानांची भाषणे-६७९. राम व वानरसैन्याचा संहार करण्याची प्रतिज्ञा. दर्पोक्ती ऐकून बिभीषणाचा संताप व त्यांची निर्भत्सना. प्रधान लज्जित, प्रधानांची आत्मप्रौढी, प्रहस्ताची आढ्यता-६८० महोदराची गर्जना. महापार्श्वाची स्वबलप्रौढी-६८१, वज्रहनाची आरोळी, सर्वांची दर्पोक्ती ऐकून बिभीषणाचे उत्तर-६८२, उपाय न सांगण्याबद्दल त्यास दोष, प्रहस्ताचा अधिक्षेप, महोदराची निर्भत्सना, महापार्श्वादिंची तशीच संभावना, प्रधानांची मिथ्या दर्पोक्ती ऐकू नये व सीता परत करावी हे श्रेयस्कर-६८३.

अध्याय छत्तिसावा पृष्ठे ६८४ ते ६९१

**• रावणाकडून बिभीषणाचा अपमान •**

हनुमंतप्रतापवर्णनाने इंद्रजिताचा संताप, बिभीषणाची निंदा-६८४. बिभीषणाचा संताप व उत्तर, श्रीरामांच्या पराक्रमाचे वर्णन-६८५. पापकर्मास सहाय्य केल्याबद्दल दोष, इंद्रजिताची वल्गना, हनुमंतापुढे इंद्रजिताची असहाय्यता, खोट्या प्रौढीचे परिणाम, बिभीषणाच्या भाषणाने सभा स्तब्ध होते-६८६. ते पाहून महापार्श्वाची गर्वोक्ती, बिभीषणाने शांतपणे महापार्श्वाची उपेक्षा केली, बिभीषणाच्या सेवकांचे भाषण -६८७. महापार्श्व लज्जित, बिभीषणाचे पुनः भाषण घोर परिणामांचे चित्रीकरण-६८८, पुढील कार्याची सूचना-६८९.बिभीषणाची सूचना ऐकून रावणाचा क्रोध बिभीषणाचे प्रत्युत्तर, बिभीषण श्रीरामाकडे जातो-६९०. रावणाचा संताप, बिभीषणावर वार करणार तोच हात लचकला व रावण कोसळला, बिभीषणावर लथेचा प्रहार, बिभीषण बेशुद्ध पडतो, त्याचे रामांकडे गमन-६९१.

अध्याय सदतिसावा पृष्ठे ६९२ ते ६९९

**• विभीषणाचे श्रीरामांकडे आगमन •**

बिभीषण प्रधानांसह परतला-६९२. बिभीषणाचे रावणाला शेवटचे सांगणे, रावणावर परिणाम, बिभीषणाचा श्रीरामांकडे जाण्याचा विचार- मातेचा शुभाशीर्वाद, बिभीषणाचे प्रयाण, बिभीषण रावणास धन्यवाद देतो, ते ऐकून रावणास पश्चात्ताप- ६९३. लोकांकडून स्तुती, बिभीषणाची रावणाला शेवटची विनंती, प्रधानांसह बिभीषण रामाकडे, वानरसैन्यात गडबड-६९४. आकाशातूनच बिभीषणाचे भाषण व सुग्रीवाला विनंती, सुग्रीवाचे रामांना निवेदन, श्रीरामांना आनंद-६९५. वानरवीरांचे मत श्रीराम विचारतात, अंगदाचे मत, हनुमंताला लंकेची सर्व माहिती, बिभीषणाच्या सत्प्रवृत्तीबद्दल खात्री-६९६. बिभीषणाच्या चारित्र्याविषयी, नुकसान न होता फायद्राच होईल, श्रीरामांच्या मताप्रमाणेच मारुतीचे मत- ६९७. श्रीरामांना आनंद व बिभीषणाचे स्वागत-६९८ लंकेचे राज्यदान-६९९

अध्याय अडतिसावा पृष्ठे ६९९ ते ७०२

**• बिभीषणाला लंकाप्रदान व राज्याभिषेक •**

मारुतीच्या वचनाने श्रीरामांचा संतोष, शरणागताला अभयच, रावण आला तरीही अभय-६९९. साधकाच्या ब्रह्मार्पणासारखीच हीही शरणागती, बिभीषणाचे अभिवचन, त्याला राज्यभिषेक केला, श्रीरामांच्या आज्ञेने हनुमंताने प्रतिलंका निर्माण केली-७००. रावणाचा वध होईपर्यंत ही लंका राहील-७०१.

卐卐卐

# श्रीभावार्थरामायण

## खंड दुसरा

## विषयानुक्रमणिका

टीप : मथळ्यापुढे असलेला आकडा पृष्ठसंख्येचा आहे.

## युद्धकांड

### अध्याय १ ते ९२

卐卐卐

श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## बालकांड

### अध्याय पहिला

॥ श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः ॥

#### राजा दशरथाचा विजय

जातो वंशे रघूणां मुनिवरवचनात्ताटकां ताडयित्वा कृत्वा पुण्यामहल्यां त्रुटितहरधनुर्मैथिलावल्लभोऽभूत्। प्राप्यायोध्यां नियोगात्पितुरटविमगान्नाशयित्वा च वालिंबध्वाब्धिं रामचंद्रो दलितदशमुखः सीतया युज्यमानः ॥१॥ चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् । एकैकमक्षरं पुसां महापातकनाशनम् ॥२॥

#### श्रीगणेश वंदन

ॐ नमो अनादि[१] आद्या । वेदवेदांतवेद्या । वंद्यांही परमवंद्या । स्वसंवेद्या[२] श्रीगणेशा ॥१॥ तुझें निर्धारतां रूप । केवळ अरूपाचे[३] स्वरूप । तेथें अवयव कल्पितां अमूप[४] । तवं कल्पनेचा लोप । स्वरूपीं तुझ्या ॥२॥ यालागीं जैसा अससी तैसियासी । नमन साकार निराकारासी । तंव अंगत्व मुकले अंगासी । भज्यभजकासी अद्वैत[५] ॥३॥ ज्ञानतेजें सतेज फरश । नित्यस्मरणाचा अंकुश । आनंदमोदकाचा सुरस । मुखीं देसी घांस निजभक्तां ॥४॥ ऐसें ऐकोन स्तवन । संतोषला गजानन । माझें वसवूनियां वदन । वक्ता वचन स्वयें झाला ॥५॥ ऐसा झाला सुप्रसन्न । तेणें विघ्नचि केलें निर्विघ्न। उन्मेखेंसीं[६] बोलिला आपण । भावार्थरामायण चालवीं वेगीं ॥६॥

---

शब्दार्थ - १. ज्याच्या आरंभाचा शेवट लागत नाही अशा, २. स्वतःसच स्वतः जाणणाऱ्या, ३. ज्याला रूप नाही अशाचे, ४. पुष्कळ, निरनिराळे , ५. ऐक्य, ६. ज्ञानस्फुरणाने.

श्रीसरस्वती वंदन : आतां वंदूं सरस्वती । जे चित्तचेतना चैतन्यशक्ती । जे सकळ स्फूर्तीची स्फूर्ती । अमूर्ताची मूर्ति स्वरूप जिचें ॥७॥ हंसवाहिनी हा शब्द रूढ[१] । परी तें परमहंसी आरूढ । गुह्यार्थ जे अति गूढ । ते दावी उघड ग्रंथार्थीं ॥८॥ परमहंस अंशाअंशीं । शोभा शोभे अहर्निशीं । सत्त्वातीत शुद्धतेसीं । तोचि निजांगासी शुभ्रवर्ण ॥९॥ ॐकार तो तिचा वीणा । त्रिमात्रा तिन्हीं तंती[२] गहना । वेदोपनिषद पुस्तक जाणा । अर्थवी अर्थना परमार्थता ॥१०॥ ऐसी अगाधत्वें अति सुंदर । प्रभा परमार्थें मनोहर । जेणें प्रकाशे चराचर । तो मिथ्या जगडंबर[३] स्वप्रभा करी ॥११॥ ऐसी ऐकोनि स्तुती । सुप्रसन्न सरस्वती । स्वभावें तिची वदनीं वस्ती । या वचनोक्ती ते वदवी ॥१२॥ ते म्हणे गा रामकथेतें । वेगीं चालवीं भावार्थें । सद्भावें होईल सरतें[४] । प्रिय संतांतें मी करीन ॥१३॥

श्रीसंत वंदन : आता वंदूं संतसज्जन । जे आर्तचातकां[५] चिद्घन[६] । त्रिविधतापां[७] उपशमन[८] । जे निजजीवन साधकां ॥१४॥ ज्यांची सहज झाल्या संगती । सकळ कर्मां होय निवृत्ती । स्वधर्म सच्छांती येती । भावार्थें प्राप्ती परमार्था ॥१५॥ सत्संगाचे निजमेळीं । परमार्थ जाय पाल्हाळीं । लगडोनि[९] ये स्वानंदफळीं । सर्वकाळीं सफळित ॥१६॥ बीजत्वाचा ना फेडिजे देंठ । आदि मध्य नाकळे शेवट । स्वानंद रसाळ फळघोंट । अनुभव स्पष्ट सत्संगें ॥१७॥ ऐसिया संतांचे महिमान । आकळे ऐसें कैंचें ज्ञान । बालत्वें बोलिलो तें न्यून । द्यावें अवधान कथेसी ॥१८॥ ऐसें ऐकोनि वचनस्तवन । सुखावले संतसज्जन । तुझे मनोगतीं आमुचें मन । सदा सावधान ग्रंथार्थीं ॥१९॥ आम्हांसी आवडे रामकथा । तेथेंही तूं रसाळ वक्ता । तरी स्तुती सांडोनि आतां । वदें ग्रंथार्था अर्थान्वयें ॥२०॥

श्रीकुलदेवता वंदन : आतां वंदूं कुळदेवतां । जे नामरूपें एकनाथा । एकपणाचेही माथां । नांदवी निजभक्तां निजान्वयें ॥२१॥ ऐकोनि सद्गुरूची बोली । बोधपरशुरामें निवटिली । अनेकत्व सोडोनि वहिली । स्वयें उठली एकत्वें ॥२२॥ ते एकरूपें एकनाथा । मूळान्वयें कुळदेवतां । एकाकारावांचूनि सर्वथा । द्वैताची कथा करूं नेदी ॥२३॥ एकपण जनीं वनीं । एकपण मनीं नयनीं । एकपण त्रिभुवनीं । नांदवीं म्हणोनि कुळदेवता ॥२४॥ ब्रह्मा आणि हरि हर । त्रिगुणी तीन्ही अवतार । मी त्रिगुणांचा परी प्रियकर । केलों साचार एकात्मता ॥२५॥ ब्रह्मा आणि हरि हर। तियेचें खेळणें जगडंबर । मज खेळावया चिदंबर[१०] । देवोनि प्रियकर कुळदेव्या[११] केलों ॥२६॥ ते जय जय जगदंबा । उदो म्हणे ग्रंथारंभा । श्रीरामकथेची शोभा । अति वल्लभा[१२] मजलागीं ॥२७॥ तेंचि भावार्थरामायण । तुज करितां निरूपण । न्यून तें तें करीन पूर्ण । कथा संपूर्ण संपादी ॥२८॥

श्रीसद्गुरु वंदन : आतां वंदूं सद्गुरू । जो स्वानंदबोधवज्रपंजरू[१३] । ज्याचेनि हा संसारू । होय सुखकरू तरणोपाया ॥२९॥ जेणें मस्तकीं ठेवितां हात । अहंभावा[१४] होय घात । सोहंभाव[१५] होय प्राप्त । दावी अप्राप्त अद्वयानंद ॥३०॥ जन तोचि जनार्दन । जनार्दन सकळ जन । एका जनार्दना शरण । मीतूंपण विरालें चिदन्वये[१६] ॥३१॥ जनार्दना पढिये[१७] एकपण । एका पढिये जनार्दन । स्वरूप एक नामें भिन्न । अनन्य शरण या नांव ॥३२॥ जनार्दन माझे मन । जनार्दन माझे नयन । जनार्दन वदतें वदन । वक्ता वचन श्रीजनार्दन ॥३३॥ जनार्दन गतीची गती । जनार्दन मतीची मती । जनार्दन स्फुरे स्फूर्ती । सकळ व्युत्पत्ति जनार्दन ॥३४॥ निजांगें जो सकळ जन । यालांगी नांवे जनार्दन । लिंगदेहा[१८] करी मर्दन । यालांगी जनार्दन

---

शब्दार्थ – १. प्रख्यात, २. तारा, ३. जगदाभास, ४. मान्य, ५. दुःखपीडित लोक हेच चातक त्यांना. ६. चिच्छक्तिरूप पर्जन्य, ७. आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक तापांना, ७. शमविणारे, ९. भरास येतो, १०. चैतन्यरूप आकाश, ११. कुलदेवीने, १२. आवडती, १३. आत्मज्ञानरूपी वज्राचा पिंजरा, १४. मीपणाला, १५. तोच परमात्मा मी अशी भावना. १६. ज्ञानाच्या योगाने, १७, आवडते, १८. पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये, पाच विषम व मन म्हणजेच लिंगदेह.

व्युत्पत्तिव्याख्या ॥३५॥ येथें तो कर्ता मी अकर्ता । हेंही बोलणें अति मुर्खता । मी कर्ता तो अकर्ता । हे परम मूर्खता सोलींव[1] ॥३६॥ यापरी मीतूंपण । दूरी दवडो जनार्दन । बोलवी भावार्थ रामायण । कथानिरूपण चालवी ॥३७॥

**रामायणाचे मूळ कारण :** अजापासोनि उत्पत्तिहेत । दशेंद्रियें अति समर्थ । जन्मला राजा दशरथ । अति विख्यात तिहीं लोकीं ॥३८॥ मूळचें अजत्व लोकांचे दृष्टी । अजन्मा राम जन्मेल पोटीं । हे रामायणींची मूळ गोष्टी । शास्त्रपरिपाठी[2] परमार्थ ॥३९॥ रावणाचे नित्यांकित । सुरवर झाले जी समर्थ । ब्रह्मादिकां चिंता अद्भुत । तिहीं रमानाथ प्रार्थिला ॥४०॥ करावया राक्षसांचा घात । मी अवतरेन रघुनाथ । रमा मुख्य कलहा हेत । इचेनि अंत निशाचरां ॥४१॥ तुम्ही सकळही सुरवर । वेगीं व्हावें वानर । आम्ही दोघें धरोनि अवतार । सत्य करूं वचनार्थ ॥४२॥ फेडावया देवांची सांकडी[3] । स्वधर्म वाढवावया वाढी । नामें मोक्षाची उभवावया गुढी । सूर्यवंशा गाढी[4] दशा आली ॥४३॥

**राजा दशरथाची कथा :** ते सूर्यवंशीं अजाचा सुत । अहमात्मा[5] जन्मला दशरथ । ऐका त्याचा वृत्तांत । धर्मयुक्त स्वधर्मी ॥४४॥ त्यासी तिघी राणिया प्रबुद्धा[6] । लोकोत्तर अति प्रसिद्धा । धर्मपत्न्या विशुद्धा । नामानुवादा अवधारा ॥४५॥ ज्येष्ठ कौसल्या ते सुद्बिधा । सुमित्रा ते शुद्ध मेधा[7] । कैकेयी ते अविद्या । मंथरा कुविद्या तीपासीं ॥४६॥ उदरा येईल आदिमूर्ती । त्यां आधीं नव्हती संतती । अपुत्रपणें नृपती । पुत्रार्थी उद्यत[8] ॥४७॥ सुख नेदी राजभुवन । सुख नेदी सिंहासन । सुख नेदी भोगस्थान । मान सन्मान सुख नेदी ॥४८॥ सुख नेदी अलंकार वस्त्र । सुख नेदी भोग कलत्र । सुख नेदी छत्र चामर । स्तुतिस्तोत्र सुख नेदी ॥४९॥ राजा पोटांतून भोगीं विरक्त । यालागीं पोटा येईल रघुनाथ । जो अत्यंत विषयासक्त । त्यासी भगवंत स्पर्शेना ॥५०॥ जेंवी आंधळे न देखे पिता । तेवी विषयी नेणती भगवंता । तोच त्यांचा प्रतिपाळिता । देखणी[9] अवस्था त्यां नाहीं ॥५१॥ दशरथा न गमे जनस्थानीं । निघाला पारधीलागीं वनीं । विचरे एकाकी होऊनी । आवडे विजनीं[10] रहिवास ॥५२॥ दुसरियाचा सहसा घात । सर्वथा न मानी दशरथ । हृदयीं कळवळला रघुनाथ । झाला विरक्त सर्वार्थी ॥५३॥ वनीं एकाकी विहार । करी वनफळांचा आहार । नावडे राजोपभाग उपचार । पुत्रार्थी थोर साक्षेपी[11] ॥५४॥

**श्रावणाची कथा :** होणारासारिखी बुद्धी । मांडली निशि अवस्था पारधी । अंधारीं श्रावणातें वधी । मातापिता खांदी कावडीसी ॥५५॥ लौकिकाची लोकवार्ता । श्रावणें पितरें कावडी ठेवतां । हे तंव समूळ अबद्ध कथा । तो मातापिता न विसंबे ॥५६॥ अंधारीं अंध माता-पिता । झाडीं ठेवी हे मिथ्या वार्ता । खांदीं घेवोनि ताता । जीवनार्थ तो आला ॥५७॥ बुडबुड कमंडलूच्या शब्दीं । ध्वनी उठली जळसंनिधी । दशरथ केवळ शब्दवेधी[12] । बाण वेधी[13] विंधिला ॥५८॥ धाव लागता संपूर्ण । काय बोलिला श्रावण । कोणा सभाग्याचा बाण । रामस्मरणेंसीं आला ॥५९॥ श्रावणासी बाण लागतां । नाठवेचि मातापिता । नाठवेचि देहममता । राम स्मरतां देह त्यागी ॥६०॥ अंतरीं श्रीरामस्मरण । परम भाग्य हें कल्याण । बाण नव्हे तो ब्रह्म पूर्ण । स्मरणेंसीं प्राण त्यागिला ॥६१॥ दशरथ बोलिला आपण । कोण्या साधूचें हें वचन । माझ्या पापाचें निर्दळण[14] । केले संपूर्ण रामनामें ॥६२॥ श्रीरामनाम स्वयें ऐकतां । रायासी न बाधे ब्रह्महत्या । रामस्मरणें देह त्यागितां । नित्य मुक्तता श्रावणासी ॥६३॥ रामनामें नित्य निर्धूत[15] । एक मुक्त एक पापातीत । ब्रह्महत्येसीं दशरथ । अति अलिप्त रामनामें

---

शब्दार्थ - १. निव्वळ, २. शास्त्राचा क्रम, ३. संकट, ४. मोठी, ५. मीच आम्हा (ब्रह्म) ह्या भावनेने युक्त, ६. शहाण्या चतुर, ७. बुद्धी, ८. उत्सुक असलेला, ९. जाणीव, १०. एकांतात, निर्मनुष्य अशा रानात, ११. यत्न करणारा, प्रयत्नशील, १२. शब्द श्रवणानेच लक्ष्य वेधणारा, १३. लक्ष्यावर, १४. निरसन नाश, १५. शुद्ध, पवित्र.

॥६४॥ दशरथ जंव येवोनि पाहे । तवं श्रावण बाणें विंधिला आहे । त्याच्या पितरें पुत्रमोहें । राजा लवलाहें शापिला ॥६५॥ आम्हांसी दिधले पुत्रदु:ख । तूंही पावसी पुत्रशोक । शापें रायासी परम हरिख[1] । मी पुत्रमुख देखेन ॥६६॥ ब्राह्मणशाप नव्हे वृथा । मी पुत्र पावेन सर्वथा । परम आल्हाद दशरथा । आनंद चित्ता वोसंडे ॥६७॥ शाप नव्हे परमामृत । उल्हासे रायाचें चित्त । पोटीं प्रकटेल रघुनाथ । शाप दशरथा सुखरूप ॥६८॥ पुत्र झाले इत्थंभुत । ऐसा मानिला निश्चितार्थ । हृदयीं संचरला रघुनाथ । उद्वेगरहित[2] यालागीं ॥६९॥ शाप देवोनि दारुण । तिहीं दोघीं सांडिला प्राण । तिघांसी देवोनि दहन । उत्तरविधान[3] करविले रायें ॥७०॥

श्रावणाचा पूर्वजन्मवृत्तांत : जळचर पक्षियांचे युग्म[4] । त्यांसी एका मीनासी मित्रत्व परम । तया समकाळें मरणधर्म । झाला तो जन्म मागील ॥७१॥ आटतां देखोनि सरोवरा । शीतळ निशिये चंचुभारा । धरोनिया तया मकरा । अगाध नीरा स्नेहें नेत ॥७२॥ तवं मार्गीं वन तें नवखंड। तेथोनि उसळले बेलुकांड । तें मत्स्यांतें लागता चंड । पहिला दुखंड धरणिये ॥७३॥ तेणें दु:खे गृध्रीं दोघीं । देह ओपिले[5] तयालागीं । तेचि ऋणानुबंधयोगी । धरिले तिघीं नरदेह ॥७४॥ मत्स्य तोचि श्रावण जनीं । पक्षिये ते जनक जननी । एके अवसरीं निमाले तिन्ही । ऐसी पुराणीं मूळ कथा ॥७५॥

ब्रह्महत्येचे दुष्परिणाम : राजा रामनामें दोषातीत । तरी लोकप्रवृत्तिशास्त्रार्थ । अश्वमेध करी दशरथ । वसिष्ठयुक्तविधाने ॥७६॥ फेडावया ब्रह्महत्याडाग । केला अश्वमेधयाग । राजा शुद्ध झाला सांग । परी राष्ट्रीं भंग[6] मांडला ॥७७॥ जें राज्यीं ब्रह्महत्या घडे । ते राज्यीं पर्जन्य न पडे । शुक्रें धरियले पाणियाडें[7]। अवर्षण पडे बहुकाळ ॥७८॥ तृणाची काडी न मिळे । उष्णें झाडोरे करपले । वृक्ष शेंडियास वाळले । सरितांचे शोषिले जळस्रोत[8] ॥७९॥ प्रजा घरोघरीं आक्रंदती। गाई हंबरडा फोडिती। द्विजांची नित्यकर्में राहती। हाहाभूत क्षितीं प्राणिमात्र ॥८०॥

दैत्यगुरूंशी दशरथाचे युद्ध : देखोनि भूतांची दशा ऐसी । राजा कळवळला मानसीं । शुक्रें धरिलें पाणियाडासी । त्यासी युद्धासी निघाला ॥८१॥ दशरथाची शक्ति कैसी । रथ चालविला स्वर्गासी । कैकेयी चालली रायासरसी । राहवितां तिसी न राहे ॥८२॥ तुम्ही जाल स्वर्गाप्रती । मी पाहीन स्वर्गसंपत्ती । वसिष्ठ म्हणे न्यावें निश्चिंती । भविष्यस्थिती जाणोनी ॥८३॥ रायासीं तिची अति प्रीती । प्रीतीनें बैसविली रथीं । क्षणार्धें शक्रलोकाप्रती । आला भूपति संग्रामा ॥८४॥ परम योद्धा श्रीरामजनक । देखोनि शुक्रें घेतला धाक । साह्य दैत्यसेना अनेक । दशरथें एकैक खिळिले बाणीं ॥८५॥ वृषपर्वा तेजोराशी । रायें विरथ केले त्यांसी । मुकुट पाडोनि भूमीसीं । मोकळे केशीं पळविला ॥८६॥ वृषपर्वा जो दैत्यनाथ । युद्धीं झाला हताहत[9] । देखोनि दैत्यसेना समस्त । पळे कुंथत रणघायीं ॥८७॥ शुक्रें युद्ध केलें अनेक । दशरथ योद्धा अति अचूक । सिंहनाद करोनि देख । शुक्रासंमुख लोटला ॥८८॥ शुक्रें केले अलोलिक[10] । अचुक छेदिला रथाचा आंख । कैकेयीनें बाहु घातला देख । तेणें पराङ्मुख नव्हेचि राजा ॥८९॥ रामप्रताप दशरथपोटीं । तेणें झांकली शुक्राची दृष्टी । धाकें पळे उठाउठीं । दिधली पाठी संग्रामी ॥९०॥

दशरथाचा विजय : ब्राह्मण म्हणोनि राखिला हात । येरवीं तत्काळ करिता घात। विजयी झाला जी दशरथ । हर्ष अद्भुत सुरनरां ॥९१॥ मोकळे झालें पाणियाडें । तत्काळ तेथें

शब्दार्थ - १. हर्ष, २. दु:खरहित, ३. उत्तरक्रिया, ४. जोडपे, ५. सोडिले, ६. अवर्षण, ७. मेघ, ८. पाण्याचे ओघ, ९. जर्जर, १०. अपूर्व.

पर्जन्य पडे । फिटले गाईंचे साकडें । ब्राह्मणीं रोकडे मांडिले याग ।।९२।। चालिले स्वाहास्वधाकार[1] । हरिखले देव पितर । दशरथावरी अपार । सुमनसंभार[2] वर्षले ।।९३।। अवघे करिती जयजयकार । इंद्रासी आल्हाद अपार । दैत्य पराभविले थोरथोर । तेणें अमरेंद्र संतोषला ।।९४।। दिव्यांबरे अलंकार । रायासी दिधले अपार । इंद्रें सन्मान केला थोर । अवघे सुरवर संतुष्ट ।।९५।। पराभविलें दैत्यगुरूसी । अति आनंद बृहस्पतीसीं । तेणें सन्मानिलें दशरथासी । धरिला पोटासीं स्वानंदे ।।९६।।

बृहस्पतींचा वर : देवगुरु वरद वदत । जे जे तुझे मनोरथ । सिद्धि पावतील समस्त । जाण निश्चित नृपनाथा ।।९७।। तुज होईल पुत्रसंतती । ते मी सांगेन श्रेष्ठ युक्ती । याग करावा अयोध्येप्रती । विभांडकाहातीं पुत्रेष्टी ।।९८।। विभांडक नित्य वनवासी । तो भेटी न देईल तुम्हांसी । मृगीसुत पुत्र त्यासी । ऋष्यशृंग तया नाम ।।९९।। तो प्रमदामदें[3] वेधवोन । नगरा आणावा छळून । येतांच त्याचें आपण । करावें लग्न निजकन्येसीं ।।१००।। तुज नाहीं गा संतान । यालागीं तुझा निजमित्र शांतन । तेणें तुज दिधलें कन्यारत्न । ते शांतनेसीं लग्न करावें ।।१।। इंद्र म्हणे दशरथासी । आणावया ऋष्यशृंगासी । अप्सरा धाडीन तुजपासीं । त्या तत्काळ त्यासी आणतील ।।२।।

कैकयीला राजाचे वरदान : युद्धीं रथीं सूदलें[4] बाहूसी । राजा तुष्टला कैकेयीसी । म्हणे देईन जें जें मागसी । ऐसी भाक[5] तिसीं दिधली ।।३।। तवं ते बोलली आपण । तुझेनि मज काय अपूर्ण । स्वर्गादि दिव्य भूषण । मी भोगीं आपण तुझेनि ।।४।। कल्पतरुपारिजातमाळा । तुझेनिशोभती माझिय गळां । स्वर्गसुखाचा सोहळा । भोगिजे स्वलीळा तुझेनि ।।५।। येणेंचि शरीरें आपण । तुझेनि भोगीं स्वर्गभुवन । तुझेनि आम्हा काय न्यून । मी सुखसंपन्न तुझेनि ।।६।। हासोनी बोलली रायासी । तुम्हीं मज दिधलें भाके सी । तें मी मागेन काळ-विशेषी[6] । यथाकाळेंसीं अनुकूल ।।७।। राजा म्हणे सत्य वचन । हें माझें भाष्यवरदान । जेव्हा तूं मागसील आपण । तत्काळ जाण मी देईन ।।८।। ऐसी दशरथाची ख्याती । स्वर्गीं देव वानिताती । दिग्गज वर्णिती दिगंती। कीर्ति त्रिजगतीं विस्तारली ।।९।। यश कीर्ति औदार्य । गुणगांभीर्य अति धैर्य । दशरथाचे वीर्य शौर्य । स्वर्गीं सुरवर वानिती ।।११०।। देवां दैत्यगुरु अदट[7] । त्याचा हरितला प्रताप श्रेष्ठ । वीर दशरथ सुभट । प्रवाद[8] पाठ तिहीं लोकीं ।।११।। उदरा येईल रघुनाथ । सकळ संपदा आलिया तेथ । श्रिया विराजमान होत । श्रीमंत दशरथ यालागीं ।।१२।। स्वर्गीं दशरथ भूपाळ । इंद्रे राहविला बहुकाळ । अति प्रीतीचा कल्लोळ । दिव्य भोग सकळ भोगविले ।।१३।।

अयोध्येत दशरथाचे अपूर्व स्वागत : येवढेनि बहुमानैश्वर्येंसीं । राजा आला अयोध्येसीं । मखरें तोरणें चौपासीं । नरनारींसी । आल्हाद ।।१४।। घरोघरीं गुढिया उभारिती । पदोपदीं आरत्या करिती । बंदिजन[9] कीर्ति गाती । ओंवाळिती धनधान्यें ।।१५।। ब्राह्मण जपती शांतिपाठ। भाट गर्जती उद्भट । नरनारी पाहती घनदाट । पायवाटे नेती घडिया ।।१६।। दशरथाचा प्रताप गहन । मी बोलिलों अल्प जाण । सकळ आकळितां निरूपण । कथा असाधारण वाढेल ।।१७।। अफाट न करावा ग्रंथ । ग्रंथीं बोलावा मुख्यार्थ । पदीं दावावा परमार्थ । हा निजस्वार्थ कवित्वाचा ।।१८।। एका जनार्दना शरण । दशरथप्रतापलक्षण । कथा झाली हे संपूर्ण । श्रीरामागमन अवधारा ।।११९।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां दशरथविजया भिगमनं नाम प्रथमोऽध्याय ।।१।। ओंव्या ।।११९।। श्लोक ।।२।।

---

शब्दार्थ - १. देवता व पितर यांचा यज्ञ, २. पुष्पवृष्टी, ३. स्त्रियांच्या काळी, ४. घातले, ५. वचन, वर. ६. पुढे योग्य स्तुतिपाठक, ७. जिंकण्यास कठिण, ८. लौकिक, ९. भाट, लीलांनी.

## अध्याय दुसरा

यज्ञपुरुषाने दिलेल्या प्रसादाचे विभाग : श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।। राजा पाहे राष्ट्र सकळ । तवं फिटलें द्वंददु:खदुष्काळ । पाहिला सर्वत्र सुकाळ । अफळ ते सफळ वृक्ष झाले ।।१।। प्रजा स्वानंदें निर्भर । गोगोधनां[1] आनंद थोर । अग्निहोत्रें घरोघर । याग[2] द्विजवर यजिती सुखें ।।२।। पृथ्वी धनधान्यें परिपूर्ण । कोणा नाहीं दु:ख दैन्य । घरोघरीं वेदाध्ययन । हरिकीर्तन हरिभक्ती ।।३।। भूतळा येईल राघव । यालागीं वैकुंठींचें वैभव । पुढे धाडिलें जी सर्व । तेणे शोभा अपूर्व अयोध्येसीं ।।४।।

अयोध्येत इंद्राच्या अप्सरांचे आगमन : राजा शोभे सिंहासनीं । अति आल्हाद राजभुवनीं । आनंद न माये त्रिभुवनीं । तंव स्वर्गाहूनि आल्या देवांगना ।।५।। नमन केले रायासी । इंद्रें पाठविलें तुम्हांपासीं । काय अनुज्ञा[3] आम्हासी । त्या कृतकार्यासी प्रेरावें[4] ।।६।। राजा म्हणे तया अप्सरासी । प्रलोभोनि[5] आणावे ऋष्यशृंगासी । कळों न द्यावें विभांडकासी । अचुक कार्यासी साधावें ।।७।। विभांडक गेला अनुष्ठानासी । एकला ऋष्यशृंग गुंफेसीं । प्रमदा[6] पातल्या तयापासीं । हावभावेंसीं उद्यत ।।८।।

अप्सरांना पाहून झालेली ऋष्यशृंगाची अवस्था : त्यांसी देखतांचि दृष्टी । ऋष्यशृंगें सांडिली पर्णकुटी । होतां डोळियां डोळेभेटी । पळे उठाउठी मृगभावें[7] ।।९।। मुख मुरडी मागिलीकडे । परतोनि पाहें तयांकडे । सवेग पाउलीं पळे पुढें । राहों राहों उडे सत्राणें ।।१०।। दुरोनि पाहे दृष्टी । मा कैसेनि होईल भेटी । बोलण्याच्या खुंटल्या गोष्टी । नातुडे दृष्टी मृगभावें[8] ।।११।। झाली विभांडकाची वेळ । प्रमदा गेल्या सकळ । ऋष्यशृंग अति विकळ । आला तत्काळ गुंफेसीं ।।१२।। करितां पितयाचे सेवेसी । त्या आठवती मानसीं । कैसे आले होते तापसी । अति विव्हळे ऋषीश्वर ।।१३।। पित पुसे पुत्रासी । आजि दुश्चित कां मानसीं । तो म्हणे आले होते तापसी । तुमचे भेटीसी अति साधु ।।१४।। त्यांच्या जटांसीं मवाळी[9] । मनोहर अंगें सोज्ज्वळीं । मज पळतां तत्काळीं । अदृश्य ते वेळी ते झाले ।।१५।। मीन घें त्यांचें दर्शन । व्यर्थ केलें पलायन । क्षणक्षणां होय आठवण । उद्वेगी पूर्ण त्यांचेनि मी ।।१६।। येरू न सांगे जीवींची गोष्टी । त्यांची लागली आवडी पोटीं । केव्हा होईल त्यांची भेटी । जीवीं चटपटी मोठी लागली ।।१७।।

ऋष्यशृंगाची मनोव्यथा : आश्रमा आले अतिथी । ते पूजावे अति प्रीतीं । मी वंचलों देहभयअशक्ती । मज त्यांची भक्ति न घडेचि ।।१८।। नाहीं पुसिलें आगमन । नाहीं दिधलें अभ्युत्थान । न करींच पूजाविधन । विमुख सज्जन म्यां केले ।।१९।। त्यांसी म्यां केले नाहीं नमन । नाहीं बोलिलों मृदु वचन । देहलोभें ठकलों पूर्ण । विमुख सज्जन म्यां केले ।।२०।। त्यांची मागुती होईल जरी भेटी । तरी पुसूं त्यांसी गुह्य गोष्टी । हृदयीं आवडी बैसली मोठी । केव्हा ते दृष्टी देखेन ।।२१।। ऐसी करितां तळमळ । तंव झाला प्रात:काळ । विभांडक अनुष्ठानशीळ । गेला तत्काळ स्नानासी ।।२२।।

ऋष्यशृंग मोहजालात अडकतो : एकाकी पुत्र पर्णकुटीं । देखोनि प्रमदा आल्या उठाउठीं । त्यांसी देखोनियां दृष्टी । करितां गोष्टी साशंक ।।२३।। धैर्य धरोनि उभा ठाके । मृगस्वभावें मागे[10] चवके[10] । आवडीचेनि भावें खुडके । सवेंचि फडके गजबजिला ।।२४।।

---

शब्दार्थ - १. गाईंना आणि गवळ्यांना, २. यज्ञ, ३. आज्ञा, ४. पाठवावे, ५. फसवून, नादी लावून, ६.अप्सरा, ७. हरिणासारख्या चंचल स्वभावाने, ८. हरिणासारख्या चंचल स्वभावाने, ९. चकाकी, १०. मागे फिरे.

तिहीं झणत्कारिला वीणा । नाद संचरला श्रवणा । मोह उपजला अंत:करणा । गमनागमना[१] विसरला ॥२५॥ घंटोपारधी[२] जैसा । मधुरनादें मृगमानसा । भुलवोनियां पाडी फांसा । तैसी दशा पावला ॥२६॥ टवकारली कर्णकुटी । उचलोनियां ग्रीवागांठी[३] । प्रमदा लक्षोनि दृष्टी । मान त्यांच्या कंठीं घातली ॥२७॥

ऋष्यशृंगावर झालेला परिणाम : मृगाचा स्वभाव पूर्ण । व्हावें नादाअधीन । जंव जंव ऐके गायन । तंव तंव आपण नाचत ॥२८॥ कोण तुमचे वस्तीचें स्थान । कोण्या अर्थें येथें आगमन । तुमचे हृदयीं व्यथा कोण । गंडें अति तीक्ष्ण दिसताती ॥२९॥ तुझे माथां शृंग तीक्ष्ण । तुज ऋष्यशृंग अभिधान[४] । आमचे हृदयीं गंडे तीक्ष्ण । गंडऋषि जाण आम्हांसी म्हणती ॥३०॥ आमचें रतिरमण[५] स्थान[५] । चाख पां येथील जीवन[६] । म्हणोनि करविती रसपान । देती चुंबन अधरामृतें ॥३१॥ आमचें सर्वांग सिद्ध अनुष्ठान । आमच्या गंडांचे स्पर्शन । करितां सुखसमाधान । म्हणोनि आलिंगन त्यासी देती ॥३२॥ आमचे वनींचा फळपाडु । म्हणोणि देती साकरेचे लाडु । ये वनीं नाहीं हा सुरवाडु[७] । अति दुर्वाडु[८] अनुष्ठान ॥३३॥ ही आमुची समाधिस्थिती । म्हणोनि रतिमुद्रा लाविती । रत्यासनीं बैसविती । झाला वशवर्ती[९] तयांसी ॥३४॥ विसरला आश्रमस्थिती । विसरला आपुली गती । यावें परतोनि मागुती । हें निश्चितीं विसरला ॥३५॥ विसरला संध्यास्नान । विसरला अनुष्ठान । विसरला जप ध्यान । गमनागमन विसरला ॥३६॥ विसरला स्थितिगती । विसरला प्राप्ति अप्राप्ती । विसरला पितृभक्ती । स्त्रियांनुवर्ती[१०] वर्तत ॥३७॥ विसरला निजावस्था । विसरला निजस्वार्था । विरसला तो निजपिता । स्त्रियां तत्वतां वश्य केला ॥३८॥ विसरला वेदाध्ययन । विरसला शास्त्रपठन । विसरला मीतूं कोण । स्त्रियांधीन तो झाला ॥३९॥

स्त्रीसंगाचे दुष्परिणाम : क्षणार्ध स्त्रियांची संगती । वनवासी होय वशवर्ती । जे नित्य स्त्रियांतें सेविती । त्यांची निर्गति[११] कैसेनि होय ॥४०॥ स्त्रियां वश्य केले वनवासी[१२] । स्त्रियां केले किंकर[१३] ग्रामवासी[१४] । अपभ्रंशता[१५] स्त्रियांपासीं । घात मुक्तीसी स्त्रीसंगे ॥४१॥ स्त्रियांचे दर्शन स्पर्शन । स्त्रियांचे जें भाषण । स्त्रियांची जी आठवण । अपभ्रंश संपूर्ण स्त्रीसंग ॥४२॥ नको स्त्रियांसीं संगत । नको स्त्रियांसीं एकांतमात[१६] । नको स्त्रियांसी हेत । होय अपघात[१७] पुरुषासी ॥४३॥ एवं स्त्रियांची संगती । ऋष्यशृंग झाला वशवर्ती । भुलोनियां स्त्रियांप्रती । आणिला निश्चितीं नगरासी ॥४४॥

ऋष्यशृंगाचा शांतनेशी विवाह : आणिले देखोनि ऋष्यशृंगासी । परम आल्हाद दशरथासी । शृंगारिले नगरासी । गुढिया चौपासीं उभविल्या ॥४५॥ मखरें तोरणे टिळे माळा । वस्त्रें भूषणें लोकां सकळां । शृंगारिलें गाई गोवळां । विभांडकें सोहळा देखावया ॥४६॥ मेळवोनि ऋषि सज्जन । वसिष्ठें निर्धारिलें लग्न । ऋष्यशृंगासी कन्यादान । केले सुलग्न शांतनेसीं ॥४७॥ शांतनेचा पिता शांतन । राजाचा मित्र जीवप्राण । तो आणिला पाचारून । लग्नालागूनी शांतनेच्या ॥४८॥ राजा दशरथ भाग्यनिधी । वसिष्ठ कुलगुरू सद्बुद्धी । विवाहहोम लग्नसिद्धी । कार्य त्रिशुद्धीं साधिलें ॥४९॥ विभांडक आला आश्रमासी । न देखे ऋष्यशृंग पुत्रासी । ठकवूनि दशरथें नेलें त्यासी । अति क्रोधेंसीं चालिला ॥५०॥ आला अयोध्या प्रांतासी । देखे शृंगारिले नगरासी । गाई गोवळे शृंगारेंसीं । मार्गीं त्यासी पैं भेटले ॥५१॥ चाळवोनि[१८] आणिलें माझ्या बाळा । कायसा ये नगरीं सोहळा । पुसता झाला गोवळां । भेटला सकळां

---

शब्दार्थ – १. जाणे येणे, २. फासेपारधी, ३. मान. ४. नाव, ५. विलास भोगण्याचे स्थान, ६. रस, अमृत, ७. सुख, ८. दुर्मिळ, ९. अंकित, अनुकूल, १०. स्त्रियांना वश होऊन. ११. मुक्तता, सुटका, १२. वनातील तपस्वी वगैरे, १३. चाकर. १४. गावात राहणारे, १५. नाश, भ्रष्टता, १६. एकांतात, १७. अरिष्ट, नाश. १८. फसवून.

मार्गस्थां ॥५२॥ ते ऐसा सांगती वृत्तांत । ऋष्यशृंग मृगीसुत । त्यासी कन्या दे दशरथ । सोहळा नगरांत लग्नाचा ॥५३॥ मूळ धाडिलें विभांडकासी । तो त्यातें न भेटे वनवासी । विधियुक्त लाविलें लग्नासी । उल्हासेंसीं दशरथें ॥५४॥

**विभांडकाला आनंद :** ऐकतां पुत्रविवाहासी । विभांडक अति उल्हासी । संतोष झाला मानसीं । प्रसन्नतेसीं तो आला ॥५५॥ राव वेगें सामोरा आला । धांवोनियां चरणां लागला । अति प्रीतीने आलिंगिला । म्हणे भला भला दशरथा ॥५६॥ सर्वालंकारभूषणेंसीं । वाहिली देखोनि वोहरासी[1] । विभांडक सुखसंतोषी । दशरथासी तुष्टला ॥५७॥ राया जे जे तुझे मनोरथ। ते ते पुरवीन मी समस्त । म्हणोनि आल्हादयुक्त । पुत्रप्रीतीं दशरथा प्रिय झाला ॥५८॥ विष्टरोक्त[2] वरासन । षोडशोपाचारें पूजन । केलें चरणतीर्थप्राशन । ऋषि प्रसन्न रायासीं ॥५९॥

**लोमपादाच्या राज्यात अवर्षण :** शांतन अति मित्र रायासी । लोमपाद म्हणती तयासी । अवर्षण त्याच्या देशीं । तेणें दशरथासी प्रार्थिलें ॥६०॥ विभांडक द्यावा मजपासीं । करवीन पर्जन्येष्टियागासी[3] । पीडा निवारेल भूतांसी । गोब्राह्मणांसी सुख करील ॥६१॥ दशरथासी उदार स्थिती । अवंचक[4] मित्रकार्यार्थीं । लोमपादाचे कार्याप्रती । प्रार्थिला निश्चितीं विभांडक ॥६२॥ विभांडक प्रेमें आपण । म्हणे भावार्थेसीं मी तुज अधीन । राया तुझें नुल्लंघीं वचन । करीन यज्ञ लोमपादाचा ॥६३॥ विभांडकें करिता यज्ञ । राष्ट्रीं वर्षला पर्जन्य । तृणधान्यें मेदिनी[5] पूर्ण । गोब्राह्मणां आल्हाद ॥६४॥ पूजोनियां विभांडकासी । आणिला दशरथपासीं । ऋषि येतांचि अयोध्येसी । रायें यागासी आरंभिले ॥६५॥

**ऋष्यशृंगाकडून पुत्रकामेष्टी यज्ञ :** वसिष्ठ श्रेष्ठ कुळगुरू । दुजा विभांडक ऋषीश्वरू । ऋष्यशृंग हर्षनिर्भरू । यज्ञांगीकारू तेणें केला ॥६६॥ ऋष्यशृंग म्हणे रायासी । मी पुत्र देईन तुम्हांसी । म्हणोनि अति उल्हासेंसीं । स्वयें यागासीं प्रवर्तला ॥६७॥ नमूनिया निजपिता । वसिष्ठ वंदोनि तत्वता । दशरथाच्या निजस्वार्था । यज्ञ करी ऋष्यशृंग ॥६८॥ कुंड मंडप वेदिका[6] सुलक्षण । इध्मा[7] बर्हि[8] त्रिसंधान[9] । करोनियां परिस्तरण[10] । अग्निस्थापन तेणें केलें ॥६९॥ प्रणीतापात्रें[11] परिपूर्ण। आज्यस्थाली[12] बर्हिआस्तरण[13]। स्रुक्स्रुवा[14] परिमार्जन[15]। केलें प्रोक्षण[16] यज्ञोपचारां॥७०॥

**यज्ञपुरुष प्रकट होतो :** ऋष्यशृंगाचें अनुष्ठान । अतिशयें श्रेष्ठ संपूर्ण । होम करितां प्रधान । यज्ञपुरुष आपण प्रकट झाला ॥७१॥ गगन झालें देदीप्यमान । परी त्या तेजाचें लक्षण । नव्हे अति शीत ना उष्ण । स्वानंदपरिपूर्ण निजतेजें ॥७२॥ वसिष्ठासी विस्मय पूर्ण । विस्मय पावे विभांडक आपण । विस्मय पावले ऋषिगण । अयोध्येचे जन तटस्थ ॥७३॥ खुंटली श्वासोच्छ्वासाची गती । लवों विसरलीं नेत्रपातीं । ऋष्यशृंगतपाची ख्याती । यज्ञमूर्ति प्रकटली ॥७४॥ मागें यज्ञ केले बहुतीं । तेणें पावले फळप्राप्ती । परी यज्ञीं प्रकटे यज्ञमूर्ती । हे केली ख्याती ऋष्यशृंगे ॥७५॥

**पायसदान :** उदरा येईल रघुपती। यालागीं यज्ञी यज्ञमूर्ती । पायसमात्र[17] घेवोनि हातीं । ऋष्यशृंगाप्रति देता झाला ॥७६॥ हा यज्ञपुरोडाश संपूर्ण । द्यावा राजपत्नियांसी विभागून । येणें पुरोडाशें जाण। पुत्रसंतान होईल ॥७७॥ येणें प्रसादें पुत्रप्राप्ती । त्याचेनि पावन त्रिजगती । ऐसी निर्माण पुत्रसंतती । होईल निश्चितीं रायासी ॥७८॥ विलंब न करावा अर्ध क्षण । तत्काळ करावा प्राशन । विलंबीं उपजेल विघ्न । हे सांगोनि आपण । अदृश्य झाला ॥७९॥ अदृश्य जालिया यज्ञमूर्ती । तें पायसपात्र घेवोनि हातीं । ऋष्यशृंग दे रायाप्रती । पुत्रार्थी प्रसाद ॥८०॥ गुह्य सांगे वसिष्ठासी । विलंबू करूं नये यासी । समभाग दे राणियांसी । विलंबासी अति विघ्न ॥८१॥

---

**शब्दार्थ** - १. वधूवराला. २. आसनविधीने, ३. पाऊस पडण्यासाठी केलेला यज्ञ, ४. निष्कपट, ५. पृथ्वी, ६. यज्ञकुंडाजवळील ओटा, ७. समिधा, ८. दर्भ, ९. तीन सांध्यांच्या दर्भाचा रज्जू, ११. चारी बाजूला दर्भ पसरणे, ११. यज्ञपात्रे, १२. तुपाचे भांडे, १३. दर्भाचे आसन. १४. यज्ञांतील लांकडाच्या पळ्या वगैरे, १५. स्वच्छ करणे, १६. मंत्रोक्त उदकसिंचन, १७. यज्ञप्रसादाचे भांडे.

फलं मूलं तथा तीर्थ प्रसादो राघवस्य च ॥ शीघ्रमेवानुसेवेत विलंबः कार्यनाशकः ॥१॥

वसिष्ठांकडून यज्ञप्रसादाचें विभाजन करणे : यालागीं तुझे नांव वसिष्ठ । कुळगुरु अति श्रेष्ठ । कार्य साधावें उद्भट । विभागीं इष्टविभागें ॥८२॥ जाणोनी भविष्याची स्थिती । वसिष्ठे पायस घेऊनि हातीं । भाग केले यथानिगुती । विभागस्थिती अवधारा ॥८३॥ कौसल्यभाग परब्रह्म । सुमित्राभाग भजनोत्तम । कैकेयीभाग परमधर्म । भागानुक्रम विभागें ॥८४॥ कौसल्या ते धर्मपत्नी । सुमित्रा वरिली साध्वी म्हणोनि । कैकेयी वरिली सुंदरपणीं । रूपयौवनीं गर्विष्ठ ॥८५॥

कैकयीचा असंतोष, वसिष्ठांचे उत्तर : कैकयी म्हणे वसिष्ठाप्रती । मी रायाची पढियंती[1] । ज्येष्ठ भाग देई मजप्रती । येरें निरुती वारिली ॥८६॥ ज्येष्ठ भाग ज्येष्ठेप्रती । तो केवीं ये कनिष्ठेप्रती । जेवीं गजाची भूषणस्थिती । अजेप्रति अतिभार ॥८७॥ जरी अमोलिक हिरे होती । ते शालिग्रामास पूज्य न होती । तूं जालियाही पढियंती । ज्येष्ठ भागाप्रती अयोग्य ॥८८॥ ज्येष्ठ भाग दिधला कौसल्येसी । दुजा दिधला सुमित्रेसी । तिजा दिधला कैकेयीसी । तिच्या मानसीं अति क्रोध ॥८९॥ कांही न चाले वसिष्ठावरी । क्रोधे द्वेष गुरूचा करी । विभाग आलियाही करीं । सुख जिव्हारी[2] असेना ॥९०॥ मी गेलें होतें स्वर्गाप्रती । म्यां भोगिल्या स्वर्गसंपत्ती । ज्येष्ठ पिंड नये माझे हातीं । तो द्वेष चित्तीं गुरूचा ॥९१॥ करावया पिंडप्राशन । दोघी केलें शुद्धाचमन । कैकेयी पाहे रायांचे वदन । तो विलंबी विघ्न वोढवलें ॥९२॥

घारीचा पूर्वजन्मवृत्तांत : जे न मानिती गुरुवचन । त्यांसी तत्काळ होय विघ्न । तेचि अर्थाचे निरूपण । कथानुसंधान अवधारा ॥९३॥ सुवर्चसा अति नाचणी[3] । नाचों आली मद्य सेवूनी । ताल चुकतां तत्क्षणीं । तिसी ब्रह्मयानें शापिले ॥९४॥ सत्यलोकी मद्यपान । अत्यंत पैं निंद्य जाण । ताल चुकली आपण । हे लक्षण मद्याचें ॥९५॥ निर्लज्जे उन्मत्ते सुंदरी । नष्ट पापिणी होय घारी । ताल चुकोनि जासी चांचरी[4] । तसें तूं करी परिभ्रमण ॥९६॥ शाप ऐकोनि दारुण । उःशाप मागे अति दीन । प्रसन्न केला चतुरानन[5] । वरदवचन तो वदला ॥९७॥ दशरथयाग पुत्रजन्य । तेथें यज्ञपुरोडाश परमान्न । त्रिधा भागें विभागिती अन्न । एक भाग प्राशन करावा ॥९८॥ ज्येष्ठभागीं तुज नाहीं गती । मध्यभागीं न पावे शक्ती । कनिष्ठा कनिष्ठभागप्रती । तेणें निर्मुक्ती निजशापा ॥९९॥ हें होईल अयोध्यानगरीं । यालागीं ते जाणावी खरी । मोक्षाची प्रथम पुरी । वेदशास्त्रां निजगजर ॥१००॥ काशी मुक्तिक्षेत्र होय पाहीं । मेल्या मुक्ति तियेच्या ठायीं । सकळ वैकुंठा गेली नाहीं । अयोध्येची नवाई अपूर्व ॥१॥ काशीहूनि ते वहिली[6] । अयोध्येची उदारता भली । त्रिवार नगरी वैकुंठा नेली । न मरता केली । सहकुटुंब मुक्त ॥२॥ प्रथम रुक्मांगदे नेली । दुजी शिबीने ख्याती केली । तिजी श्रीरामें वहिली । वैकुंठा नेली निजगजरें ॥३॥ आणि चौथेनि ही मागुती । अयोध्या जाईल वैकुंठाप्रती । ऐसी वसिष्ठादिकांची ख्याती । अयोध्येप्रति असे पैं ॥४॥ यालागी मुक्तिक्षेत्राच्या शिरीं । अयोध्या जाण प्रथम पुरी । जड जीवांतें उद्धरी । शाप निवारी स्नानमात्रें ॥५॥ ते अयोध्येसी भागप्राशन। केलिया तुज शापमोचन । ऐसे बोलिला चतुरानन । अप्सरा आपण घारी जाली ॥६॥

कैकेयीच्या प्रसादावर घारीची झडप : ते ऐशीं सहस्र वर्षेंवरी । भोंवे अयोध्येच्या महाद्वारी । यज्ञभाग देखतां करीं । झडप मारी तत्काळ ॥७॥ कौसल्या सत्य पतिव्रता । तीवरी न घालवेचि सर्वथा । सुमित्रा शुद्ध सात्विकता । तीहीवरी तत्वता न घालवेची ॥८॥ कैकेयी अति क्रोधायमान । निजभागीं नाहीं मन । रागें पाहे रायाचें वदन । तंव घारीनें हिरोन भाग नेला ॥९॥ तोंडावरी हाणी पाखीं[7] । हात ओरबाडिला नखीं । भाग घालोनियां मुखीं । गेली एकाएकीं गगनासी ॥११०॥ लोक करिती हाहाकार । एक सवेग विंधिती तीर । अवघे

शब्दार्थ - १. प्रिय आवडती, २. मनात, अंतःकरणाला, ३. नाचणारी अप्सरा, ४. झोकांड्या खात, ५. ब्रह्मदेव, ६. अधिक, ७. पंखांनी.

पाहती ऊर्ध्वशिर । थोर चमत्कार सर्वांसी ॥११॥ लागतां पांखाची झडे । कैकेयी उलथोनि क्षितीं पडे । भाग गेला मग रडे । रायाकडे पाहोनी ॥१२॥ रायास म्हणे पाहतां काय । येरू म्हणे मी करूं काय । तुझा गर्व तुज आडवा होय । येथें उपाय न चालती ॥१३॥ घारी भाग करितां प्राशन । तुटले तिचें देहबंधन । खुंटलें गमनागमन । सुखसंपन्न ती जाली ॥१४॥ तोचि भाग उपेक्षितां । कैकेयीसी परमावस्था[1] । बाप गर्वाची अति गर्वता । निजस्वार्था अति घात ॥१५॥ जेवीं उपेक्षितां आत्मज्ञान । अंगी आदळे अज्ञान । विषयी पावती अध:पतन । ते दशा परिपूर्ण कैकेयीसी ॥१६॥

कैकेयीचा आक्रोश : काय मायबाप बहुत दिवस जितां । पुत्र उपेक्षी हेळसितां[2] । रडे मेल्यामागें तर्पण[3] करितां । पिंड देतां सद्गति ॥१७॥ तैसा दशा कैकेयीसी । उपेक्षिलें निजभागासी । गेलिया मागें कुसमुसी[4] । उसकाबुकसीं स्फुंदत ॥१८॥ जे मी रायाची पढियंती । ते मी जालें अभाग्य क्षितीं । मज नव्हेचि पुत्रसंतती । निंद्य सर्वार्थीं मी जालें ॥१९॥ माझें रायासी अति कोड[5] । तें कोणासी नव्हेची गोड । जळो माझें काळें तोंड । लोक वितंड निंदिता मज ॥१२०॥ ज्येष्ठ भाग मागतां आवडी । तंव कनिष्ठासीच आली घाडी । मज हे थडी[6] ना ते थडी । निंद्य रोकडी मी जालें ॥२१॥ स्वार्था नाडलें मी संपूर्ण । जिवों न लाहें लोकांभेणें । मज येतें कां वो मरण । रडे दारुण संतापें ॥२२॥ स्वर्गीं जे मी सुरवरां वंद्य । ते मी मृत्युलोकीं निंद्य । विभागीं भाग्य माझे मंद । पाषाणवत मी झाले ॥२३॥ जे मरी रायाची आवडती । तेणेंचि जगा नावडती । पाषाणवत माझी स्थिती । देवपितरार्थी अति निंद्य ॥२४॥ अंधाहातींचे रत्न पडे । तें त्याचें त्यास न सांपडे । कैकेयीही तेणेंचि पाडें । रडे पडे अति दु:खी ॥२५॥ केश सुटले मोकळे । गडगडां पृथ्वीवरी लोळे । अश्रुधारा स्रवती डोळे । अति तळमळे तळमळीं ॥२६॥ देखोनि कैकेयीचें दु:ख । कौसल्या कळवळली देख । हरूनि तिचें असुख । प्रवर्ते देख उपकारार्थीं ॥२७॥ श्रीभावार्थरामायण । एका जनार्दना शरण । जालें येथवर निरूपण । पिंडप्राशन अवधारा ॥२८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां पुरोडाशविभागो नाम द्वितीयोऽध्याय: ॥२॥ श्लोक ॥१॥ ओंव्या ॥१२८॥

## अध्याय तिसरा

कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांच्याकडून प्रसाद भक्षण : श्रीसद्गुरवे रामचंद्राय नम: ॥ कैकेयी धरोनि पोटेसीं । कौसल्या संबोखी[7] तियेसी । तूं का व्यर्थ दु:खी होसी । आम्हां दोघींसी दु:ख एक ॥१॥ एकोदरा सख्या बहिणी । दोघी पर्णिजे दोघींजणीं । त्यांसी कांही नाहीं मिळणी । दुस्तर पाटणी नांदती सख्या ॥२॥ दोघीं नाहीं नित्य भेटी । दोघीं नाहीं नित्य गोष्टी । दोघीं नाहीं नित्य दृष्टी । मिथ्या चावटी सख्यत्वाची ॥३॥ दोघीं नाही नित्य संबंध । दोघीं नाहीं नित्य संवाद । दोघीं नाहीं नित्य बोध । तो सख्यसंबंध अति मिथ्या ॥४॥ दोघीं नाहीं एक सुख । त्या सख्या मानिती मूर्ख लोक । तूं करिसी व्यर्थ दु:ख । आम्हां निजसुख एकत्वें ॥५॥ आम्हां तुम्हां एक आहेवपण[8] । आम्हां तुम्हां एक निजभूषण । आम्हां तुम्हा एक निजमंडन । सख्यपण एकत्वें आम्हां तुम्हां ॥६॥ आम्हां तुम्हां एक सांगात । आम्हां तुम्हां एक भोगार्थ । आम्हां तुम्हां एक कांत[9] । सख्य सख्यार्थ आम्हां तुम्हां ॥७॥ आम्हां तुम्हां एक नाहो[1] । आम्हां तुम्हां एक सद्भावो । आम्हा तुम्हा एकात्मस्नेहो । सत्य सख्यान्वयो[10] तुम्हां आम्हां ॥८॥ आम्हां एक निवासस्थान । आम्हां एक भोगभुवन[11] । आम्ही एकें सुखें संपन्न । सत्य सखेपण आम्हां तुम्हां ॥९॥ आम्हां एक नित्यत्वें चाळिता । आम्हां एक

शब्दार्थ – १. फार चिंता, २. अवहेलना, उपहास, ३. पाणी देता, ४. धुसफूस, ५. कौतुक, आवड, ६. ही बाजू किंवा ती बाजू. ७. समाधान करी, ८. सौभाग्य, ९. पती, १०. सख्यसंबंध, ११. सुखोपभोग भोगण्याचे स्थान.

नित्यत्वें प्रतिपाळिता । आम्हां एक नित्यत्वें न्याहाळिता । हे नित्य सख्यता आम्हां तुम्हां ॥१०॥ आम्हां तुम्हां एक गोसावी[१] । आम्हां तुम्हां एक निववी[२] । आम्हां तुम्हां एक जीववी । हे सत्य पदवी सख्याची ॥११॥ आम्हां तुम्हां एक पांचभौतिक[३] । एकचि हस्तपादादिक । आम्हां तुम्हां देखणें एक । हें अलोलिक[४] निजसख्य ॥१२॥ आम्हां तुम्हां एक नाथ । सत्यत्वें जाण दशरथ । तूं खेद करितेसी व्यर्थ । ऐक वृत्तांत साजणी ॥१३॥ पुढिलांचे[५] देखोनि दुःख । सुख मानिता परम मूर्ख । परांचे निरसोनि असुख[६] । द्यावे सुख शुद्धत्वें ॥१४॥ परदुःखें होय सुखी । तो ब्रह्मराक्षस तिहीं लोकीं । सदा निंद्य शास्त्रमुखीं । शुद्ध सात्विकी तो नव्हे ॥१५॥ तूं राहसी अपुत्रपणीं । आम्ही सुख पावों पुत्रपणीं । तैं पूर्वज पडती पतनीं । तो दोष त्रिभुवनीं न समाये ॥१६॥ उपजला पुत्र देऊं जातां । तो पोसणा[७] म्हणती तत्वता । साधूं दोघींच्या निजस्वार्था । अवंचकता परमार्थ ॥१७॥

उदकस्य रसः शैत्यमन्नस्य स्वादरो रसः । आनुकूल्यं रसः स्त्रीणां मित्रस्यावंचको रसः ॥१॥

उदकाची गोडी शीतळता । अन्नाची गोडी आर्द्रता । स्त्रियांची गोडी अनुकूलता । अवंचकता मित्रगोडी ॥१८॥ आम्ही तुम्ही सख्या बहिणी । ऐसी बोलिजे कहाणी[८] । ते करून दावावी करणी । येर बोलणीं अति मिथ्या ॥१९॥ जैसें बोले तैसें करी । त्यातें वंदिजे हरहरीं । येर ते व्यर्थ बोलाची ज्ञानफरारी[९] । तो संसारीं पढतमूर्ख ॥२०॥ जैसा बोले तैसा क्रियार्थ । या नांव मुख्य परमार्थ । येर बोलणें तें व्यर्थ । विषयस्वार्थ परमार्थीं ॥२१॥

**कौसल्या व सुमित्रा स्वतःच्या प्रसादातील अर्धा भाग कैकेयीला देतात :** माझें बोलणे सत्य सांग । माझ्या भागाचा अर्धभाग । साजणी घेई वो सवेग । दोघींचे अभंग सख्यत्व येणें ॥२२॥ ऐकतां कौसल्येचें वचन । कैकेयीस जालें समाधान । करूनि शुद्धाचमन । भागार्ध आपण घे स्वानंदें ॥२३॥ मृत पावे अमृतपान । तृषिता मुखीं निज जीवन । अंधा उघडले लोचन । तैसें वचन कौसल्येचें ॥२४॥ रंका लाधलें निधान[१०] । अकर्मी पावे ब्रह्मज्ञान । दुष्काळिया मिळे मिष्टान्न । तैसें वचन कौसल्येचें ॥२५॥ कौसल्येची बुद्धि समान । समत्वें भागविभाग आपण । कैकयीसी दे विभागून । सुखसंपन्न समत्वें ॥२६॥ भाग देतां कैकेयीसी । कौसल्या अति उल्हासी । सवतीभाव नाहीं मानसीं । देत उल्हासीं निजभाग ॥२७॥ जैसी कौसल्येची विधी । तैसीच सुमित्रेची सद्‌बुद्धी । बाप सत्संगाची सिद्धी । दे अर्धार्ध निजभाग ॥२८॥ सत्संगाचें निजमहिमान । कौसल्या देत आपणासमान । कौसल्येसंगें सुमित्रा जाण । दे आपण भागार्ध ॥२९॥ सुष्ठु[११] मैत्री कौसल्येसीं । म्हणोनि सुमित्रा म्हणणें तियेसी । तेणें सुमित्रा भावेंसीं । दे कैकेयीसी भागार्ध ॥३०॥ जैसा संग होय ज्यासी । तैसी बुद्धि होय त्यासी । कौसल्यासंगे सुमित्रा तैसी । दे कैकेयीसी भागार्ध ॥३१॥

**ऋषींना आनंद :** ऐकोनि कौसल्येचा वचनार्थ । देखोनि भागदानींच निज स्वार्थ । वसिष्ठ आनंदें नाचत । स्वयें डुल्लत स्वानंदें ॥३२॥ करितां भागप्राशन । उदरा आला रघुनंदन । धन्य अयोध्या-राजभुवन । तेथें स्वानंदघन क्रीडेल ॥३३॥ उभवोनी स्वानंदाची गुढी । नारदाची पडे उडी । नाचूं लागे आवडी । सूर्यवंशा गाढी दशा आली ॥३४॥ सुटेल देवांची ब्रांधवडी[१२] । तुटेल नवग्रहांची बेडी । मुक्ति सुरवाडेल[१३] गाढी । सुख सुरवाडी पाल्हेजेल[१४] ॥३५॥ माझ्या वाल्मीकीचें वचन । जालें प्रत्यक्षप्रमाण । राम प्रकटला निजनिधान । धन्य जन अयोध्येचे ॥३६॥ लंकेपुढें युद्ध दारुण । राम करील रणकंदन । तें मी देखेन आपण । हरिखें उड्डाण करी नारद ॥३७॥ जेवित्याची चवी जेविता जाणे । तेवीं वसिष्ठनारदांचे नाचणें । तें सुख तिहींच

---

शब्दार्थ - १. स्वामी, पती, २. शमवी. ३. शरीर, ४. अपूर्व गोष्ट, ५. दुसऱ्यांचे, ६. दुःख, ७. दत्तक, ८. गोष्ट, ९. अफाट बडबड, १०. ठेवा, ११. उत्तम, १२. बंधन, १३. सुख पावेल, १४. पालवी फुटेल.

भोगणें । येरीं पाहणें टकमकां ॥३८॥ विभांडक आनंदे मनीं । कौसल्या सत्वशिरोमणी । इचेनि पावन जाली अवनी । धन्य त्रिभुवनीं कौसल्या ॥३९॥ ऋष्यशृंग तये वेळीं । सुखावला सुखकल्लोळीं । उल्हाण करोनि दे आरोळी । कौसल्या भूतळीं आणील राम ॥४०॥ कौसल्येचा शुद्ध भावो । ते भावीं प्रकटला रामरावो । धन्य दशरथ महाबाहो । गर्भान्वयो[1] अलोकिक ॥४१॥ विस्मय करिती ऋषीश्वर । तटस्थ ठेले सुरवर । अवघे करिती जयजयकार । भागिला रघुवीर चतुर्थ भागीं ॥४२॥ मुख्य द्वेष सवतीमत्सरासी । तो मत्सर नाहीं कौसल्येसी । म्हणोनि श्रीराम आला कुसी । त्या गर्भासी अवधारा[2] ॥४३॥ सवतीमत्सर कैकेयीसी । म्हणोनि हारविलें निजभागासी । शुद्धभाव कौसल्येसी । तिच्या गर्भासी श्रीराम ॥४४॥ एक ताट आलें यज्ञशेषीं । तेथेचि भर्ग निश्चयेंसीं । तो विभागिला चतुर्थ भागेंसीं । चतुर्विध त्यासी बोलिजे ॥४५॥ मुख्यार्ध कौसल्येपासी । तद्भजनार्थ जाणा सुमित्रेसी । दोनी अर्धार्ध कैकेयीसी । स्वतंत्र भाग तिसी असेचिना ॥४६॥ पुढां पोटीं होती पुत्र । ते तिचे नव्हती स्वतंत्र । यालागीं बोलिजे परतंत्र । कैकेयीचरित्र नावडे त्यांसीं ॥४७॥ असो पुढील कथेसी । वसिष्ठें पाचारोनि तिघींसी । देवोनि भाग विभागासी । म्हणे विलंबासी करूं नये ॥४८॥

कैकयीचा उद्वेग व याचे परिणाम : दोघीं निजभागप्राशन । केलें न लगतां दर्शन[3] । कैकेयी भागप्राशन । करितां उद्विग्न ते जाली ॥४९॥ दोनी अर्थ जंव घोंटी । तंव ते बैसले कंठीं । गिळूं जातां अति संकष्टीं[4] । घोंटितां घोटी घोंटेना ॥५०॥ भाग तिचे नव्हते स्वतंत्र । परभाग गिळूं न शके वक्त्र । पांढरे जाले तिचे नेत्र । वमनोद्गार ते जाली ॥५१॥ पराचें ओझें वाहणें । तें आपणासी होय उबगवाणें[5] । तेवीं परभाग घोंटिता तिणें । जीवें प्राणें घोंटेना ॥५२॥ विभागें रोधली तिची घांटी । ऐसें वसिष्ठें देखिलें दृष्टी । मंत्रोदक देऊन उठाउठी । तेणें घोटी विभाग ॥५३॥ सेवितां ते मंत्रोदक । फिटली शंका पावली सुख । पुत्रगर्भाचा संतोष । आत्यंतिक ते पावे ॥५४॥ साधु असतां निजनिकट । भलतें निवारे संकट । गर्भमंडित जालें पोट । सुख उद्भट[6] कैकेयीसी ॥५५॥ हरपले सांपडे रत्न । मरत्या घडे अमृतपान । तेवीं वसिष्ठोदकें जाण । सुख परम कैकेयीसी ॥५६॥

सत्संगमहिमा : यालागी सत्संगती । दुःख नव्हे ना अधोगती । सत्संगाची परम ख्याती । नेणों किती उद्धरले ॥५७॥

सत्संगेन हि दैतेया यातुधाना : खगा मृगाः । गंधर्वा राक्षसा नागाः सिद्धचारणगुह्यकाः ॥२॥

दैत्य दानव[6] राक्षससृष्टी । गण गंधर्व मृग पक्षी पुष्टी । सिद्ध चारण गुह्यक कोटी । उद्धरले सृष्टी सत्संगें ॥५८॥ मनुष्यलोकींची गोष्टी । सत्संग लाधल्यापाठीं[7] । उद्धरले कोट्यनुकोटी । सभाग्य सृष्टी सत्संगें ॥५९॥ धन्य धन्य तो दशरथ । ज्यासी सत्संग पुरोहित । त्याची काठी[8] मानी आदित्य । तो घरांत निजसखा ॥६०॥ तेणें वसिष्ठें आपण । तिघींस करविलें पिंडप्राशन । एका विनवी जनार्दन । गर्भावधारण अवधारा ॥६१॥ इति श्रीभावार्थरामायण । एकाजनार्दना शरण । पिंडभाग पिंडप्राशन । जालें संपूर्ण अवधारा ॥६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाका[illegible]टीकायां पिंडप्राशनं नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥ श्लोक ॥१॥ ओंव्या ॥६२॥

## अध्याय चौथा

कौसल्येचे डोहाळे : श्रीरामचंद्राय नमः । ऐकोनियां कथाश्रणव । ज्ञाते म्हणती अप्रमाण[9] । नव्हे हें मूळीचें निरूपण । तिहीं शिवरामायण पहावें ॥१॥ स्कंद[10] पुसे अगस्तीप्रती । शिवभवानी राम जपती । राम कोण तो त्रिजगतीं । यथास्थिती मज सांगा ॥२॥ तो म्हणे श्रीराममहिमान ।

शब्दार्थ - १. गर्भसंबंध, २. समजा, ३. दांत, ४. त्रासदायक, ५. फार, ६. दनूचे मुलगे, ७. प्राप्त झाल्यावर, ८. दंड, ९. खोटे, १०. कार्तिकस्वामी.

सांगावया मी अति दीन । जेथें वेदां पडे मौन । तें वदावया वदन मज नाहीं ।।३।। तुझ्याचि ऐसा प्रश्न । सदाशिवाप्रति जाण । पार्वती पुसे आपण । श्रीराम कवण मज सांगा ।।४।। श्रीरामाची कोण स्थिती । कोण श्रीरामाची कीर्ती । समूळ सांगा मजप्रती । पुसे अति प्रीती जगदंबा[1] ।।५।। कोण श्रीरामाची ख्याती[2]। श्रीरामाची कोण गती । श्रीरामाची कोण उत्पत्ती । कोण त्रिजगीं श्रीराम ।।६।। जेथें सदाशिव स्वयें वक्ता । मुख्य पार्वती स्वयें श्रोता[3] । ते ही शिवरामायणी कथा । संदेहार्था पहावी ।।७।।

**श्रीरामांची श्रीएकनाथांना भावार्थरामायणाची प्रेरणा :** तूं कैसा झालासी वक्ता । पुसाल माझी योग्यता । तेही मी सांगेन तत्वता । सावध श्रोतां परिसावी ।।८।। मी नेणें मूळींच्या संस्कृतासी । मूर्खपण माझी मिरासी[4] । त्या मूर्खाच्या मुखासी । श्रीराम ऐसी कथा वदवी ।।९।। माझे अंगी मूर्खपण । माझें मी जाणें संपूर्ण । न करीं म्हणतां रामायण । श्रीराम आपण प्रथा पेरी[5] ।।१०।। प्रेरिताही मी न करीं जाण । तंव स्वप्नामाजी रामायण । श्रीराम विस्तारी संपूर्ण । ऊण खूण ग्रंथांची ।।११।। जागृतीमाजी[6] वर्ततां । पुढे प्रकाशे रामकथा । दुश्चितपणें ठेवों जातां । राम तत्वता रामायण दावी ।।१२।। करूं जातां फुकट गोष्टी । त्यांमाजी रामकथा उठी । रामें पुरविली पाठी । खिळिली दृष्टी रामायणीं ।।१३।। ऐसियांत न करीं म्हणता । राम चढे मीपणाचे माथां । मग तो आपुलिया निज सत्ता । वदवी कथा बलात्कारें ।।१४।। मज निजलों असता जाण । राम थापटी आपण । म्हणे उठी करीं रामायण । तेथे मी कोण न करावया ।।१५।। यालागीं कथादूषण[7] भूषण[8] । माझें अंगीं न लागे जाण । कर्ता श्रीराम आपण । माझे मीपण तो जाला ।।१६।। ग्रंथ निंदिती अथवा वंदिती । ते दोघे आम्हां ब्रह्ममूर्ती। हे श्रीजनार्दनाची युक्ती । उपदेश एकांतीं निजगुह्यार्थ ।।१७।। असो अबद्धही रामकथा । पवित्र करी गातां ऐकता । हें न माने ज्यासी विकल्पता । त्यासी तत्वता लोटांगण ।।१८।।

यद्वाग्विसर्गो जनताघविप्लवो यस्मिन्प्रतिश्लोकबद्धवल्यापि ।।
नामान्यनंतस्य यशोंकितानि यच्छृण्वति गायंति गृणांति साधव : ।।१।।

अबद्ध[9] रामकथा श्रवणीं । वक्ता पावन तत्क्षणीं श्रोत्यांच्या पापा होय धुणी[10] । अबद्ध वाणी पढतांही ।।१९।। अबद्धही रामचरित्र । महापातकियां करी पवित्र । तो राम गातां माझें वक्त्र[11] । केवीं अपवित्र ज्ञाते म्हणती ।।२०।। कथा नंदिती वंदिती जनीं । ते माउली माझे दोनी । निंदकते सखी जननी । मजलागूनी कृपाळु ।।२१।। जैस जननीचे करतळ । वरीवरी क्षालिती बाह्य मळ । निंदक सबाह्य कलिमळ । करी निर्मळ निजवदनें ।।२२।। यालागीं निंदकचि तत्वता । साह्य सखा परमार्था । त्या निंदकातें निंदितां । दोषी सर्वथा स्वयें होय ।।२३।। निंदा म्हणिजे परमामृत । निंदा निर्द्वंद्व[12] सुखस्वार्थ । निंदक न पाहे निजस्वार्थ । अति समर्थ परोपकारी ।।२४।। जेथें निंदा सुखरूप समाय[13] । त्याचे मस्तकीं वंदूं पाय । धन्य धन्य त्याची माय । जो निंदा साहे निर्द्वंद्व ।।२५।। आतां किती सुचवूं परिहार[14] । परिहार तोचि अहंकार । मी होऊं पाहें कवीश्वर । हा अपराध थोर मजमाजी ।।२६।। आतां रामकथा रामायणीं। तो मी अपराध न गणीं । झणीं[15] निवाराल तुम्ही कोणी । घेऊं द्या धणी[16] कथामृताची ।।२७।।

**रामकथा पुढे सुरू करण्याविषयी श्रीनाथांना श्रोत्यांची विनंती :** तंव श्रोते म्हणती नवलाहो । ग्रंथीं साधिला शुद्धान्वयो । परिहारमिषें पहा हो । केला नि:संदेहो ग्रंथार्थ ।।२८।। याचे मराठी बोल । परी अमृतातें करिती फोल । क्षीराब्धीहूनि अति सखोल । नित्य नवी बोली स्वानंदसुखाची[17] ।।२९।। श्रवणीं ऐकतांचि कथा । सुख उपजतसे चित्ता । धन्य धन्य तूं रसाळ

---

शब्दार्थ – १. पावती. २. कीर्ती, ३. ऐकणारा, ४. वतनदारी, ५. स्फूर्ती देई, ६. जागेपणी, ७. डाग, कलंक, ८. शोभा, ९. असंबद्ध, विसंगत, १०. शुद्धता, ११. मुख, १२. कलहरहित, १३. रहाते, मावते, १४. निवारणाचा उपाय, १५. कदाचित्, १६. तृप्ती, १७. आत्मसुखाची.

वक्ता । कथापरमार्थ निजपूज्य ॥३०॥ तुझेनि मुखें रामायण । श्रीराम वदविताहे आपण । परिहारें जालें ब्रह्म पूर्ण । कथानिरूपण चालवीं ॥३१॥ हें एकोनि संतवचन । निवाला एका जनार्दन । मस्तकीं वंदोनियां चरण । ग्रंथनिरूपण अवधारा ॥३२॥ पुढील कथेचे अनुसंधान । केलिया पिंडप्राशन । तिघी जणी सुखसंपन्न । गर्भसमाधान तिघींसी ॥३३॥

कैकेयीचे डोहाळे विचारण्यासाठी दशरथांचे आगमन : वसिष्ठ म्हणे रायासी । धर्ममर्यादा आहे ऐसी । डोहाळे पुसावे स्त्रियांसी । मागती त्यांसी तें द्यावें ॥३४॥ शिरी वंदोनि ब्रह्मवाक्यासी । राजा निघाला वेगेंसी । आला कैकेयीभुवनासीं[1] । अति उल्हासीं पुत्रार्थीं ॥३५॥

राजाचें विपरीत स्वागत : कैकेयी गर्भविलासी । बैसली होती मंचकासीं । येतां देखोनि रायासी । निजसेजेसी पहुडली[2] ॥३६॥ जेथें भ्रतारा स्त्रियेसी वर्चस्वपण । तेथें मर्यादा राखे कोण । बरवेपणाचा गर्व पूर्ण । त्याहीवरी जाण गर्भिणी ते ॥३७॥ अमावास्ये अंधारी रात्री पाहीं । त्याहीवरी दाटे धुई[3] । गडदपणें[4] न दिसे कांही । ते दशा पाहीं कैकेयीसी ॥३८॥ राजा पुसे डोहळे तिसी । ते हांसोनि म्हणे रायासी । जरी पुरवाल निश्चयेंसी । तरी मी तुम्हांसी सांगेन ॥३९॥ राजा बोले अति प्रीती। तुझी नुल्लंघितां वचनोक्ती[5] । तुज म्यां नेले स्वर्गाप्रती । इंद्रादिकांहातीं गौरविलें ॥४०॥ ऐसें मागे तुझें वचन । नाहीं उल्लंघिलें आपण । आजिचा प्राप्त काळ पूर्ण । डोहळे संपूर्ण करीन तुझे ॥४१॥

कैकेयीचे दुष्ट डोहाळे : येरी म्हणे रायासी । डोहळे माझ्या निजमानसीं । राज्य द्यावें कनिष्ठासी । ज्येष्ठा वनवासीं घाडावें ॥४२॥ दवडावे दूरी दुरंतरता[6] । जेथें नायके अयोध्येची वार्ता । आणि या ज्येष्ठाची कथा । न ये सर्वथा अयोध्येसी ॥४३॥ ऐसें विपरीत[7] करितां । तुम्ही म्हणाल हे अधर्मता । तो अधर्म ठेवा माझिये माथां । जो वेदशास्त्रार्थां अति निंद्य ॥४४॥ अति निर्देची निंद्य टाळी । ते वाजो[8] माझिये कपाळीं । मज निंदिजे लोकीं सकळीं । ही आवडी नव्हाळी[9] डोहळियां ॥४५॥ ऐकोनि तिचे डोहळे । राजा सर्वांगें कंटाळे । अश्रुपूर्ण[10] जाले डोळे । होय तत्काळें कंपायमान ॥४६॥ मन बुद्धि चित्त चांचरे[11] । निश्चयासी आले शाहारे । बैसलीं इंद्रियांचीं द्वारें । प्रळयमहापूरें धैर्य गेलें ॥४७॥ इचे डोहळे पुरवितां । नाश होईल स्वार्थपरमार्थां । शेखीं[12] नुरे उरी जीविता । सर्वीं सर्वथा अति घात ॥४८॥ ऐसी रायासी जाली व्यथा । मग तिसी न बोलेचि मागुता । अत्यंत वचकोनि चित्ता । हाये निघता कंटाळोनी ॥४९॥

राजाचे सुमित्रेकडून आनंदपूर्ण स्वागत : सवेंचि[13] निघे सुमित्रेमंदिरी । तवं ते आली सामोरी । मस्तक ठेविला चरणांवरी । आरती करी निंबलोण[14] ॥५०॥ आलो देखोनि प्राणनाथ । जीवीं उल्हास[15] अति अद्भुत । आनंदें पूर्ण भरित । प्रेमाचा अत्यंत पूर आला ॥५१॥ घालोनियां वरासन[16] । भक्तिभावें चरणक्षाळण । करी चरणतीर्थप्राशन । सुमनादि चंदन यथोक्त पूजा ॥५२॥ सुगंध सुवास सुमनमाळा[17] । घाली निजनाथाचिया गळां । जोडल्या[18] करीं[18] त्या काळा । उभी वेल्हाळा[19] निकट ना दुरी ॥५३॥ गर्भें टवटवीत मुखकमळ । शोभे सर्वांग सोज्ज्वळ । गर्भतेजें निजनिर्मळ । मिरवे वेल्हाळ भक्तिभावें ॥५४॥ जोचि भावो निजनाथेंसी । तोचि भावोसमस्तेंसीं । तेणेंचि भावे नृपनाथासी । पूजी उल्हासीं समसाम्ये ॥५५॥ भक्तिभावो तिचा वांटा । त्याचा उदरीं केला साठा । तैशाच रीतिच्या बाह्य चेष्टा । देखे द्रष्टा[20] होवोनि रावो ॥५६॥ देखोनि सुमित्रेचा भावो । अत्यंत सुखावला रावो । तिचे

---

शब्दार्थ - १. कैकेयीच्या मंदिरात, २. निजली, ३. धुके, ४. अंधारामुळे, ५. बोलणे, ६. अतिशय लांब, ७. विलक्षण, ८. बसो, लागो, ९. अपूर्वता, १०. आंसवांनी भरलेले, ११. भांबावू लागे, १२. शेवटी, १३. लागलाच, १४. कुरवंडी, १५. आनंद, १६. उत्तम बैठक, १७. फुलांचे हार, १८. हात जोडून, १९. प्रिया, २०. पाहाणारा.

भागांचा निर्वाहो । देवाधिदेवो प्रतिपाळो ॥५७॥ कैकेयीडोहळियांचे दुःख । राजा विसरला निःशेष । तिचें चुंबोनियां मुख । पुसे कौतुक डोहळियांचे ॥५८॥ कोण आवडी तुझ्या पोटीं । ते सांगावी जीवींची गोष्टी । येरी सलज्ज अधोदृष्टी । न करी चावटी बहुबोल ॥५९॥

सुमित्रेचे डोहाळे : ज्येष्ठाची जे ज्येष्ठसेवा । ते मज द्यावी नरदेवा । हेची आवडी माझिया जीवा । सत्यस्वभावाप्रीत्यर्थ ॥६०॥ ज्येष्ठसेवेचें निजसुख । मज आहे आत्यंतिक । तुम्हीं द्यावें हेचिं एक । नावडे आणिक विषय मज ॥६१॥ नावडे वस्त्र दिव्यान्न । न आवडे राज्य त्रिभुवन । नावडे स्वर्ग ब्रह्मसदन[1] । ज्येष्ठसेवेचाचूनी ॥६२॥ ऐसे स्वामी प्राणपती । तुझे पाय सेव्य असती । ज्येष्ठसेवेची अति प्रीती । डोहळे निश्चिती हे माझे ॥६३॥ ऐकोनि ऐसें वचन । रायाचें विस्मित मन । इचे डोहळे विलक्षण । दिसे सुलक्षण सर्वार्थीं ॥६४॥ एक पायसाचें[2] ताट । वसिष्ठें भाग केले चोखट । तिचे डोहाळे कां बिकट । इचे अति श्रेष्ठ परमार्थीं ॥६५॥ तिचे भाग नव्हती स्वतंत्र । पोटींचा गर्भ तो सावत्र । यालागीं ते अपवित्र । डोहळे होती कैकेयीसी ॥६६॥ सावत्र छळिती मातेसीं । शनि लाता हाणी छायेसीं । ठावके[3] पडलें सूर्यासी । तूं माता नव्हेसी सर्वथा ॥६७॥ तैसे सावत्र गर्भ तियेसी । यालागीं अधम डोहळे इयेसी । निंद्य व्हावें मी जगासी । वदे गर्भवासी सावत्र ॥६८॥ सुमित्राभाग स्वतंत्र । यालागीं डोहळे अति पवित्र । रायाचें निवालें जिव्हार[4] । हर्षें निर्भर[5] तो जाला ॥६९॥ मग उठोनि उल्लासेंसीं सुमित्रा आलिंगी हृदयेंसीं । जे जे डोहळे निजमानसीं । ते ते पावसी मदनुग्रहें ॥७०॥ नाना अलंकारभूषण । राजा त्यागी ओवाळून । तिसी करवी निंबलोण । द्विजां दे दान नाना वस्त्रें ॥७१॥

कौसल्येची स्वानंदस्थिती : आतां रायाची ज्येष्ठ राणी । कौसल्या जे कां धर्मपत्नी । न समाये त्रिभुवनीं । तो गर्भाथानीं श्रीराम ॥७२॥ जो त्रिभुवनीं न समाये जाण । तो भावार्थीं सांठवे आपण । सद्भाव जालिया संपूर्ण । ब्रह्म परिपूर्ण हृदयाकाशीं ॥७३॥ तेथोनि राजा तत्क्षणीं । उत्कंठा कौसल्यादर्शनीं । भुवनीं न देखे राजपत्नी । न देखे शेजशयनीं पर्यंकीं[6] ॥७४॥ ऐका कौसल्यासंभ्रम[7] । उदरीं संभवला[8] श्रीराम । पुसतां डोहळियांचे काम । आनें[9] आन[9] वर्तलें ॥७५॥ ऐका कौसल्येची स्थिती । अखंड वसे पैं एकांती । न साहे संग सांगाती । गर्भप्रतीति श्रीराम ॥७६॥ नावडे वस्त्रभूषण । नावडे सुमन चंदन । नावडे भोग दिव्यासन । नावडे शयन पर्यंकीं ॥७७॥ देहीं निर्लोभलक्षण[10] । हेंचि वैराग्य दृढ दारुण[11] । उदरा आला श्रीरघुनंदन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥७८॥ आस्था सांडोनियां जाण । आवडी वसवी विजन[12]। लेइली गर्भ दिव्यांजन । राम निधान[13] उदरातें ॥७९॥ करोनि कल्पनेसी मारू । सेविला निर्विकल्प[14] कल्पतरू । तयातळीं अति आदरू । सहजासनीं सुंदरू बैसलीसे ॥८०॥ गर्भोदरीं बैसली दृष्टीं । वृत्ति झाली उफराटी । आपल्यासमान देखे सृष्टी । गर्भपृष्टी स्वभावें ॥८१॥ यावरी तो राजबाळा[15] । वसवी शुद्ध सुमनशाळा । द्वैतदृष्टी[16] न लगे डोळां । सुखसोहळा अद्वैतीं ॥८२॥ राजा पाहे भोगभुवनीं । तेथे नातुडे[17] राजपत्नी । पाहे अति लोभें अवलोकोनी। परी ते नयनीं न दिसे ॥८३॥ पाहता वैखरीभीतरीं[18] । तेथें न देखे ते सुंदरी । मध्यमेच्या[18] माजघरी । पाहतां दुरी दृष्टीसी ॥८४॥ शोधिता पश्यंतीवोवरीं[18] । तेथें न देखे निजसुंदरी ।

---

शब्दार्थ - १. ब्रह्मलोक, २. खिरीचे, ३. कळले, ४. अंत:करण, ५. परिपूर्ण, ६. पलंगावर, ७. कौसल्येचा आवेश, ८. राहिला, ९. निराळा, १०. आशारहित चिन्ह, ११. मोठं, १२. एकांत, १३. ठेवा, १४. कल्पनारहित, १५, राजकन्या, १६. भेददृष्टी, १७. न मिळे, १८ (१) परा, (२) पश्यंती, (३) मध्यमा (४) आणि वैखरी या चार वाणी आहेत.

चढला परेच्या उपरी । शुद्धि निर्धारीं न लभेची ॥८५॥ काढोनि द्वैताची अगळी[1]। फेडूनि शब्दाची शृंखळा[2] । उघडी अद्वैतसुमनशाळा । गुरुवाक्यमेळा निर्धारें ॥८६॥ तेथें रिघतां[3] अति सांकडीं । फेडिलीं रजतमांचीं लुगडीं । शुद्ध सत्वाचीं भूषणें आवडी । तींही काढी तत्काळ ॥८७॥ ऐसा एकाकी एकला । राव प्रवेशे सुमनशाळा । पाहे स्वयें सगर्भ बाळा । तंव तेथेंही डोळा दिसेना ॥८८॥ मग नेत्र भरोनि विवेक । देखे निर्विकल्प निजसुख । तयातळीं बैसली देख । अति सुरेख कौसल्या ॥८९॥ राजा पाहे निजतन्वंगी[4] । तंव तेज न समाये अंगींचे अंगीं । धन्य हेंचि जगीं । गर्भलिंगी[5] सलिंग ॥९०॥ कैसी बैसली सहजासनी । जैसी योगिया लागली उन्मनी[6] । पाहतां निवाला लोचनीं । धर्मपत्नी सगर्भा[7]॥९१॥ तिसी देखतांचि दृष्टी । आनंदे वोसंडे सकळ सृष्टीं । तिसी करितां सुखगोष्टी । पडे मिठी स्वानंदीं ॥९२॥ मग बैसवोनि पैं नेहटीं[8] । हातीं धरोनि हनुवटी । झणीं[9] माझी लागेल दृष्टी । जे डोहळे पोटीं ते सांग ॥९३॥ येरी न पाहे वरती । दृश्य[10] द्रष्टा[11] न देखे स्थिती । रामरूपीं रतली[12] वृत्ती । व्यक्ताव्यक्ती न देखे ॥९४॥ राजा वोसंडला अति प्रीतीं । आलिंगली दोहीं हातीं । येरीस लागली विदेहस्थिती । देहअहंकृति[13] नाठवे ॥९५॥ उदरीं संभवला विदेही । यालागीं आठवू नाठवें देहीं । सबाह्य अंतरीं उरली नाहीं । तटस्थ पाही श्रीराम ॥९६॥ राजा म्हणे कटकटा[14] । कैसेनि ही अवचटली[15] बरवंटा[16] । कीं महद्भूत आलें पोटा । नयनीं ताठा चढलासे ॥९७॥ कैसें करील मेघश्याम । केवीं पुरे पुत्रकाम । सिद्धि पाववील पुरुषोत्तम । आत्माराम रघुवीर ॥९८॥ रामनाम कर्णपुटीं । ऐकतांचि गोरटी । उघडोनि पाहे दृष्टीं । देखे सृष्टी राममय ॥९९॥ जंव सादरे राव पाहे । नयनीं निजतेज न समाये । मी एक गर्भिणी येथें आहें । हा आठवू देहें नाठवे ॥१००॥ जवं तळवटी[17] पृथ्वी पाहे । तंव ते रामरूप जाली आहे । फिटली पार्थिवाची सोय । देहीं विदेह श्रीराम ॥१॥ जंव अवलोकी दाही दिशा । तवं पडला रामरूपें ठसा । पाहतां न दिसे आकाशा । श्वासोच्छवासामाजी राम ॥२॥ वृक्ष वल्ली आणि मंडप । अवघें देखे रामरूप । अशोक नाग चंपक । पाहतां एक श्रीराम ॥३॥ जो उदरीं संभवला । तोचि सर्वेंदियी वोसंडला[18] । देहाचा पांग फिटला । प्रपंच जाला ब्रह्मरूप ॥४॥ देखे क्रीडेचें पाडसें । पाहतां रामचि प्रकाशे । जें जें देखावया बैसे । तें तें देखे श्रीराम ॥५॥ दोरू सर्प नाहीं जाला । दोरा सर्प नाहीं भेटला । दोरें सर्प नाहीं देखिला । भ्रमें भाविला[19] भुजंग ॥६॥ तेवीं ब्रह्मीं प्रपंच नाहीं देखिला । ब्रह्मीं प्रपंच नाही चाखिला । ब्रह्मीं प्रपंच नाही ऐकिला । भ्रमें भाविला अति भ्रांती ॥७॥ प्रपंच एक जाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता । पुढें होईल मागुता । हेंही कल्पांतीं घडेना ॥८॥ याविषयींचा श्लोक । वसिष्ठ बोले अलोकिक । त्याचा अर्थ तात्विक । परिसोत सात्विक सज्जन ॥९॥

भ्रमेणाहं भ्रमेण त्वं भ्रमेणोपासको जनः भ्रमेणेश्वरभावत्वं भ्रममूलंमिदं जगत् ॥२॥

भ्रमें श्रेष्ठत्वें ईश्वर । भ्रमें कर्म धर्म सदाचार । भ्रमें वाढला व्यवहार । भ्रममूळ संसार निजसत्य ॥११०॥ जनकादिक मुक्त असती । तेही प्रपंचीं वर्तती । त्यांच्या प्रपंचाची स्थिती । वसिष्ठ श्लोकोक्ति वदे तें ऐका ॥११॥

ब्रह्मत्वं ब्रह्मभवनं ब्रह्मभूतपरंपरा । ब्रह्माहं ब्रह्म मच्छत्रुर्ब्रह्म सन्मित्रबांधवाः ॥३॥

जैसा सोन्याचा रवा घेता । तो अलंकार समस्तां सोनेपणें घे तत्वता । तेवीं व्यवहार मुक्ता परब्रह्मत्वें ॥१२॥ मुक्त ब्रह्मरूप मीतूंपण । शत्रु मित्र ब्रह्मपूर्ण । ब्रह्मरूप त्रिभुवन । भूतें

---

शब्दार्थ - १. आडसर, २. साखळी, कडी, ३. शिरता, ४. आपली सुंदर स्त्री, ५. गर्भचिन्हाने, ६. जेथे मनाचा लय होतो अशी पाचवी अवस्था, ७. गरोदर, ८. नीट खेटून, ९. कदाचित्, १०. पाहण्याची वस्तू, ११. पाहणारा, १२. रत झाली, मुराली, १३. देहाचा मीपणा, १४. हाय, हाय, १५. झपाटली, १६. सुंदरी, १७. खाली, १८. भरून राहिला, १९. मानला.

सनातन ब्रह्मरूप ॥१३॥ ऐसिया ब्रह्मस्थिती । मुक्त संसारीं वर्तती । जिण्या मरण्याची भ्रांती । नाहीं त्या चित्तीं ब्रह्मरूपत्वें ॥१४॥ कौसल्या रामगर्भत्वें निभ्रंत । राजा पुत्रधर्में कर्मभ्रात । डोहाळे तिसीं पुसतां तेथ । विनोद विस्मित परमार्थी परिसा ॥१५॥ स्वस्ति श्रीरामायण । एका जनार्दना शरण । डोहळ्यांचे निरूपण । विनोद पूर्ण परब्रह्म ॥१६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां कौसल्यादोहदनिरूपणं नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ श्लोक ॥३॥ ओंव्या ॥११६॥

## अध्याय पाचवा

**कौसल्येचे डोहाळे :** श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः । पूर्वकथेचे[1] अनसंधान । कौसल्यें उघडिले नयन । डोहळे पुसावसा जाण । राजा सावधान स्वयें जाला ॥१॥ कौसल्या रामगर्भे स्वरूपस्थिती । राजा प्रवृत्तिधर्में[2] पुत्रार्थी । दोहींच्या संवादाची प्रीती । डोहळे निश्चिती अवधारा ॥२॥ राजा म्हणे स्वमुखें कांते[3] । काय आवडी आहे तूतें । वेगीं सांग डोहळ्यांतें । सांडीं परतें भ्रमासी ॥३॥ येरी म्हणे मी अवघा राम । मजमाजी तंव कैंचा श्रम । अवतरलों पुरुषोत्तम । देवांचे श्रम फेडावया ॥४॥ ऐकोनि शंकिजे रायें । म्हणे इसी जाहलें तरी काये । आप आपणियातें पाहें । सावधान[4] होय प्रिये तूं ॥५॥ येरी[5] म्हणे मी नव्हे स्त्री ना पुरुष । नर वानर ना राक्षस । ईशाचा[6] जो निज ईश । परम पुरुष श्रीराम ॥६॥ राजा म्हणे तन्वंगी[7] । काय झालें तुजलागीं । कैंचा भ्रम भरला आंगीं । पाहें वेगीं मी कोण ॥७॥ येरी म्हणे माझ्या ठायीं । मी तूं ऐसे उरले नाहीं । अधिष्ठान[8] जो विदेही । आत्मा पाहीं श्रीराम ॥८॥ दशरथ म्हणे कौसल्ये । माझें तुझें जैं लग्न झालें । तैं रावणें अति विघ्न केलें । ते विसरलीस कैसेनी ॥९॥

**रावणाचे नाव ऐकताच :** नांव ऐकोनि रावण । येरी म्हणे दे दे धनुष्य बाण । करूं लंकेचें निर्वाण[9] । मारूं दारुण[10] राक्षस ॥१०॥ पाचारा[11] वनींचे वनचर । मुकुट कुंडलें द्या अलंकार । राज्या देवोनि धरा छत्र । वानरभार चालवा ॥११॥ केउता[12] गेला रे हनुमंत । अंगद सुग्रीव जांबवंत । अझूनि रावणाची मात[13] । जगाआंत उरलीसे ॥१२॥ अहो वज्रदेही निजगडा । पुच्छें घालोनियां वेढा । लंका जाळा रे भडभडां । पाडा तुडतडां राक्षस ॥१३॥ अमित पाचारा वानर । शिळीं बुजा रे सागर । पाडा पाडा रे नगर । निशाचरवस्ती जे ॥१४॥ केउते गेले रे जुत्पती[14] । लंका उलथा रे हाताहातीं । पाडा पाडा चारी भिंती । दुर्ग[15] किती आम्हांसी ॥१५॥ आगड[16] भेदा रे चोहटा । पांडू लंकेच्या त्रिकूटा । मारूं रावणा अति दुष्टा । स्वधर्मवाटा रुंधित ॥१६॥ बाण घेवोनि स्वांगें । छेदूं कुंभकर्णाचे टांगे[17] । भेदूं रावणाची सर्वांगे । भिडतां मागें मी न सरें ॥१७॥ राक्षसांच्या शिरकमळीं । खेळूं लंकेपुढें चेंडूफळी । साजुक[18] रुधिरांच्या कल्लोळीं । तृप्त कंकाळीं[19] करूं आजी ॥१८॥ तोडा नवग्रहांची बेडी । सोडा देवांची बांधवडी[20] । उभवा रामराज्याची गुढी । आज्ञा धडफुडी[21] तिहीं लोकीं ॥१९॥ पाचारा बिभीषण पवित्र । करा राज्याभिषेक धरा छत्र । लंका दिधली स्वतंत्र । यावचंद्रसूर्यपर्यंत ॥२०॥ नासा रे जगाचीं दुःखें । त्रैलोक्य भरारे हरिखें । दुमदुमित विश्व सुखें । परम पुरुषें श्रीरामें ॥२१॥ नामें कळिकाळासी शिक[22] । यम पराङ्मुख कांपती ॥२२॥ जो वाचे उच्चारी रामनाम । त्याचे पुरवावे सकळ काम[23] । हरावे जन्ममरणश्रम । सहज सम करावें ॥२३॥ नित्य जपे जो

---

शब्दार्थ - १. मागील कथेने, २. संसारी वृत्तीने, ३. स्त्रिये, ४. सावध शाश्वत, अविनाशी, ५. ती, ६. परमेश्वराचा, ७. नाजुक, सुंदर स्त्रिये, ८. आश्चर्य, ९. शेवट, १०. भयंकर, ११. बोलवा, १२. कोठे, १३. गोष्ट, १४. वीर, योद्धे, १५. किल्ले, १६. खंदक, १७, कपाळ, डोके, १८, ताज्या रक्ताच्या, १९. रानटी, क्रूर, पशू, २०. बंध, २१. सत्य, २२. शिक्षा, २३. इच्छा,

नाम । तो जाणावा मजचि सम । पुरुषांमाजी पुरुषोत्तम । सकळ नेम तेणें केले ॥२४॥ रायासी पडली आशंका । पोटीं विवसा[1] आली देखा । कीं गर्भीचं उठली ताटका । सिस्थिया सुखा अंतरलों ॥२५॥ येरी म्हणे रे सुमित्र नेटका । अझूनि कैंची रे ताटका । छेदूनियां बाणें एका । जनाच्या सुखा अवरोधी ॥२६॥ राजा म्हणे न चले मंत्र । गुणिया[2] पाचारा विश्वामित्र । येरी म्हणे केउता गेला सुमित्र । आला विप्र यागासी[3] ॥२७॥ वेगें बाणे दे कां बहुवस । विंधूनि मारूं मारीचबाहूंस । आणि राक्षसां करूं नाश । हाहाहूहू करिताती ॥२८॥ राजा करिताहे स्मरण । परशुराम अवतार जाण । त्याचेनि नांवे हरो दारुण । महद्भूत जाण संचार ॥२९॥ येरी म्हणे ऐकें गा जामदग्न्या । धनुष्य भंगिले म्यां प्राज्ञा । विचारीं ब्राह्मणा सर्वज्ञा । जाई तू अज्ञा तपासी ॥३०॥ हिचिये देहीं संचाराचा ताठा । मुखीं सुटलासे फांटा[4] । कायसे डोहळे कटकटां । नेणों पोटा काय आलें ॥३१॥ वेगीं पाचारा वसिष्ठा । पंचाक्षरी तो अदटा[5] । परीक्षा करील तो श्रेष्ठा । सकळ वरिष्ठा तो गुरू ॥३२॥ येवोनि वसिष्ठ जंव पाहे । तंव ते राममय जाली आहे । म्हणे धन्य धन्य वो माये । वंदावे पाय इयेचे ॥३३॥ आदरें पाहूं गेला दृष्टी । चित्तचैतन्या पडली मिठी । हर्षे बाष्प[6] दाटे कंठी । पडिला सृष्टीं मूर्च्छित ॥३४॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । रोमा[7] फरकती स्वेदांकुरा[8] । अंग अश्रूंचिया धारा । रोमा फरकती स्वेदांकुरा[8] । अंग कांपतसे थरथरां । अवस्था मुनीश्वरा अनिवार ॥३५॥ राजा म्हणे कांही न चाले येथें । गुणिया ग्रासिला भूतें । कोण सोडवील यातें । म्हणोनि चित्तें व्याकुळ ॥३६॥

**दशरथाची कौसल्येविषयी चिंता :** म्हणे मी कौसल्ये आवरूं । कीं वसिष्ठां सावध करूं । ऐसा जाजावे[9] नृपवरूं । धांवा थोर पोकारी ॥३७॥ श्रावणवधाचे क्लेश। सोसिले म्यां असोस[10] । पुढां तेचि बहुवस । वसिष्ठदोहत्येचे ॥३८॥ अगा विधातिया[11] श्रेष्ठा । काय लिहिले अदृष्टा[12] । भूतें ग्रासिले वसिष्ठा । दोष मोठा मज घडला ॥३९॥ यज्ञ केला म्यां पवित्र । कुळीं पावेन सुपुत्र । तंव माझारी हें चरित्र । कैंचें विचित्र वोढवलें ॥४०॥

**कुलगुरूंचे आश्वासन :** ती अवस्था[13] जिरवोनि पोटीं । वसिष्ठे उघडिली दृष्टी । राव झोंबला कंठीं । सृष्टि उफराटी पैं जाली ॥४१॥ स्वामी वसिष्ठा तुजही बाधा । हे तों गोष्टी न घडे कदा । पुत्रसुखाआड आपदा । भाग्यमंदा आम्हांसी ॥४२॥ वसिष्ठ म्हणे भाग्य श्रेष्ठ । पोटीं आले वैकुंठपीठ । पुरुषोत्तम जाला रे प्रकट । दैवें उत्कट कौसल्या ॥४३॥ जें जे कांही हे वदली । ते जाण पां ब्रह्मबोली । ते ते ख्याती करील भली । सुदशा आली सूर्यवंशा ॥४४॥ मुनिजनांचे ध्येय ध्यान । कीं देवांचे देवतार्चन । जगाचा जगज्जीवन । राम निधान प्रत्यक्ष ॥४५॥ राया तुज नकळे सर्वथा वर्म । उदरा आलें परब्रह्म । धन्य धन्य आमचे कर्म । पुरोहितधर्म[14]ये वंशी ॥४६॥ चरणीं उद्धरील शिळा । परणील जनकाची बाळा । आनंदवील लोकां सकळा । राम जिव्हाळा जीवाचा ॥४७॥ याचेनि नामें मुक्ति फुकटा । नगरी नेईल वैकुंठा । राम म्हणता पापिष्ठा । गति उत्कृष्टा देईल ॥४८॥ धन्य धन्य सूर्यवंश । धन्य धन्य अयोध्येचा देश । धन्य धन्य कौसल्यागर्भवास । जगन्निवास पैं आला ॥४९॥ धन्य धन्य एथींचे जन । धन्य धन्य दशरथा तुझें मन । धन्य धन्य आमचे नयन । राम निधान देखती ॥५०॥

**दशरथाचा आनंद :** ऐसें वसिष्ठ सांगता । टक[15] पडिले दशरथा । आठवू नाठवे चित्ता । पुत्रकथा ऐकोनि ॥५१॥ ऐकतां ज्याचेनि श्रवणें । पडले तनमना भुलवणें । काय होईल त्याचेनि दर्शनें । ते सुख जाणे तो एक ॥५२॥ रामनामेंवीण कथा । ज्याल्या होत्या अनाथा । त्या केलिया सनाथा । कौसल्यासुताचेनि नामें ॥५३॥ ऐकतां कौसल्येचे डोहळे ।

---

शब्दार्थ – १. भूत, २. ज्ञानी, मंत्री, ३. यज्ञाला, ४. बडबड. ५. वस्ताद, दांडगा. ६. गळा भरून आला, ७. लव, केश, ८. घामाचे बिंदू, ९. कष्ट पावला, १०. सहन न होणारे, ११. ब्रह्मदेव, १२. प्रारब्धा, १३. लहर, १४. उपाध्येपणा, १५. स्थितप्रज्ञता.

दशरथासी सुखसोहळे । तेणें परमानंद उचंबळे । वंदी तत्काळें वसिष्ठासी ॥५४॥ एका जनार्दन विनंती संतां । ऐसी डोहळियांची वार्ता ऐकतां उल्लास होय चित्ता । त्याची जन्मकथा अवधारा[१] ॥५५॥ एका जनार्दनीं परम । डोहळियांचा अति संभ्रम । अजन्मा जन्मेल श्रीराम । तो जन्मसंभ्रम अवधारा ॥५६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां कौसल्यादोहदनिरूपणं नाम पंचमोध्याय: ॥५॥ ओंव्या ॥५६॥

## अध्याय सहावा

### श्रीरामजन्मप्रसंग

**श्रीरामाचा जन्मकाळ :** श्रीसद्गुरूरामचंद्राय नम: ॥ श्रीरामाचा जन्मप्रभाव[२] । अजन्मा जन्मेल रामराव । पाहूं आला सुरनरसमुदाव[३] । तो नवलाव[४] पाहूं आले ॥१॥ प्रसूतिसमय[५] कौसल्येसी । तंव अयोध्येच्या चौपासीं । विमानें दाटलीं आकाशीं । विबुध[६] वेगेंसी पैं आले ॥२॥ सूर्यवंशा येईल रघुनाथ । यालागीं मध्यान्हीं आला आदित्य । लग्नीं साधिला अभिजित[७] । जन्ममुहूर्त राघवा ॥३॥ वक्री[८] अतिचर[९] होऊन । वेगीं चालोनि आपण । केंद्री[१०] आणि उच्चस्थान[११] । तेथे ग्रहगण स्वयें आले ॥४॥ शुद्धसुमनीं वसंत ऋतु । मधुमास[१२] अति विख्यातु । शुक्ल पक्ष नवमी आंतु । जन्म रघुनाथ पावला ॥५॥

**सुखरूप प्रसूती व श्रीरामांचे प्रकटन :** श्रीराम स्वयें अयोनी । तो स्पर्शला नाहीं जन्मयोनी । कौसल्या सन्मुख देखे नयनीं । आश्चर्य मनीं विस्मित ॥६॥ नाहीं लागली वेण[१३] उद्भट । नाहीं दुखिंनलें गर्भपोट । स्वयं राम जाला प्रकट । अति उद्भट[१४] निजतेज ॥७॥ स्वप्रकाशें स्वलीला । निजतेजें अति सोज्वळा । घवघवित घनसावळा । दे डोळां कौसल्या ॥८॥ जेणें निजतेजविलासे। मीतूपणाचा ठावचि पुसे । जग आत्मत्वें प्रकाशे । सोहळा उल्लासे परमानंदे ॥९॥ ज्या तेजाचे निजनिर्धारें । अहं साहें समूळ विरे । त्रैलोक्य ब्रह्मत्वें अवतरे । सर्वांगी भरे स्वानंद ॥१०॥ ज्या तेजाचे निजनिष्ठे । विषयांचें विषयत्व आटे । बंधमोक्षाचे बिरडें[१५] फिटे । स्वयं कोंदाटे[१६] परब्रह्म ॥११॥ ज्या तेजाचिये दीप्ती । रवि चंदू हे स्वयें हरपती । ते तेज प्रकाशे ब्रह्मस्फूर्ती । निर्विषयस्थिती सुख कोंदे ॥१२॥ ऐसें स्वाभाविक सहज । तेजाचें जें निजतेज । त्याची मूर्ति चतुर्भुज । देखतसे चोज[१७] कौसल्या ॥१३॥ देखे ठकराचें निजठाण । द्रों हातीं धनुष्यबाण । करावया राक्षसनिर्दळण[१८] । ओढी काढोनि विन्यांसें ॥१४॥ करावया बंदिमोचन। सुरनरग्रहां अभयदान । अभयहस्तें संपूर्ण । विराजमान रघुवीर ॥१५॥ करितां रामनामस्मरण । जीवांस करावया ब्रह्मपूर्ण । स्वयें कृपाळू आपण । वरदहस्तें पूर्ण आश्वासीत[१९] ॥१६॥

**सामुद्रिक चिन्हें :** चरणांतळी आरक्त शोभा । ले‍पित बाळसूर्याचा प्रभा । जगातें भुलवी जगदंबा । तीही चरणरंगा भूलली ॥१७॥ माया अतर्क्य सर्वांसी । वेदशास्त्रीं प्रसिद्धी ऐसी । तीही भुलली चरणांसी । जाली दासी सर्वदा ॥१८॥ सनकादिक अति विरक्त । तेही चरणारविंदी[२०] आसक्त । भ्रमर होवोनियां संतत । आमोद घेत स्वानंदें ॥१९॥ चरणांचिया सामुद्रिका । न वर्णवे वेदेशेषादिकां । ध्वजवज्रांकुश ऊर्ध्व रेखा । पायीं पद्म देखा यवांकित ॥२०॥ चरणांतळी आरक्त शोभा । बरवंटी शुद्ध श्याम प्रभा । इंद्रधनुष्य मिरवे नभा । तैसी शोभा शोभत ॥२१॥ उपासका यंत्र पूर्ण । तैसी घोंटी पैं त्रिकोण । दोहीं पायी नीळवर्ण ।

---

शब्दार्थ - १. ऐका. २. जन्मकाळची कीर्ती, ३. देवांचा आणि मनुष्यांचा समुदाय, ४. नवल, आश्चर्य, ५. बाळंतपणाची वेळ, ६. देव, ७. दिवसाचा आठवा मुहूर्त, म्हणजे मध्यान्हाच्या पूर्वी, २४ मिनिटे आणि मध्यान्हानंतर २४ मिनिटे, ८. मागच्या राशीस येऊन, ९. वेगवृद्धी होऊन, १०. कुंडलीतील १ ले, ४ थे, सातवे आणि दहावें स्थान केंद्र, ११. ग्रहांची उच्चस्थाने मेषेचा सूर्य, वृषभेचा चंद्र आणि मकरेचा बुध इत्यादी. १२. चैत्र महिना, १३. प्रसूतिकाळच्या वेदना, १४. मोठे, १५. फास, कानी, गुळखी, १६. भरते, १७. कौतुक, १८. राक्षसांचा नाश, १९. धीर देत, २०. पदकमळी.

विराजमान शोभती ॥२२॥ यंत्रपीठीं वर्ण प्रबळा । तैशा पोटरिया सकळा । अक्षररूपें त्या निसळा[१] । अति निर्मळा सकुमारा ॥२३॥ जानुचक्रें[२] अति वर्तुळ । जैसे आरसे निज निर्मळ । निजात्मरूप सकळ । तेथें तत्काळ प्रतिबिंब ॥२४॥ कर्दळीस्तंभाचे[३] शुद्ध सार । त्याहूनि मांडिया सुकुमार । लागतां खुपती चंद्रकर[४] । ऐसें अरुवार[५] जघनद्वय[६] ॥२५॥ श्रुति[७] आणि स्मृती । दोहीं पायीं वांकी गर्जती । अंदुवा[८] जाण निश्चिती । उपवेद स्थितिविभागें ॥२६॥ वेदांत शुद्ध शास्त्र थोर । चरणीं गर्जती तोडर[९]। धन्य दैत्यांचे शरीरभार । चरणीं निरंतर रुळती तोडरी ॥२७॥ जगाचें गुह्य श्रीराम पूर्ण । त्या गुह्याचें गुह्य लक्षण । तेथें पावों शके कोण । तें सुख संपूर्ण जानकी भोगी ॥२८॥ स्वयें अच्छिद्रत्वें[१०] मनोहर । आणि पुढिलांचे आच्छादी छिद्र । तोचि कांसेसीं पीतांबर । तेजें दुर्धर देदीप्यमान ॥२९॥ पीतांबर श्रीरामकांसेसीं । लागला निजभावेसी । तेणेचि तो अनायासीं । गुह्यगुह्यासीं पावला ॥३०॥ नाभी सोल अतिशयेसीं । होवोनि कासाविसी वरता आला ॥३१॥ सहस्राब्द[११] बुडतां ब्रह्मासीं । ठावो[१२] न निघे तयासी । त्यासी चतुःश्लोकी उपदेशूनी । श्रेष्ठ तेव्हां श्रीरामें आश्वासोनी । बैसविला कमळासनीं । त्याचे हृदयीचें करोनि स्थापिला ॥३२॥ तें श्रीरामाचें नाभिस्थान । बैसला देखे कमळासन[१३] । आकाश हरपे महिमान । बोलतां मौन श्रुतिशास्त्रां[१४] ॥३३॥ ज्याचे हृदयचिदाकाशीं । चिदंशासी एकत्वें ॥३४॥ तेथें अनन्यत्वें मुनिजन । स्वकार्येंसीं । सिद्ध पावले त्या ठायासी । तेंचि हृदयीं पदक पूर्ण । गुणेंवीण ल्यालासे ॥३५॥ सूक्ष्म माजाची जी जडोनि जाले अभिन्न । अति थोरी । अभिमान होता केसरीं[१५] । देखोनि राममध्यकुसरी[१६] । लाजें रानभरी ते जाले ॥३६॥ पहावया श्रीराममध्यरचना । अभिमानत्याग पंचानना[१७] । मेखळा अंगवूनि अंगवणा । मध्यभागीं जाणा चित्रत्वें जडले ॥३७॥ जो अपरंपार अनंत । त्यास अनुभवी आकळित । तेवी मेखळेमाजि[१८] रघुनाथ । दिसे समस्त आकळिला ॥३८॥ जालिया निजवस्तुप्राप्ती । सकळ वृत्ति उपशमती[१९] । तेवीं क्षुद्रघंटिकांची पंक्ती । जे मेखळेप्रती अधोमुख ॥३९॥ नाना मतांचा जितमेळा । त्याचि किंकिणी[२०] ज्वाळमाळा । यांपरी विचित्र लीळा । कटीं मेखळा शोभत ॥४०॥ पीतांबराचे उभय भाग । दोन्ही भांगी मुक्तलग[२१]। तेणें अंगाचा फिटला पांग । अंगींचह अव्यंग[२२] निजांगशोभा ॥४१॥ ज्याचें पाहतां वक्षस्थळ[२३]। सबाह्य भरित समूळ । तेथें वसती विजनशीळ[२४] । जन वन सकळ समसाम्य ॥४२॥ पाहतां ज्याचा कंबुकंठ[२५] । ॐकारामाजी वेदांची ते वाहती वाट । तेथोनियां होती प्रकट । स्वरवर्ण वरिष्ठ मर्यादा ॥४३॥ चिदानंददीप्ती सोलींव वर्णव्यक्ती । तेवीं मुखामाजीं दंतपंक्ती । चौकीचे चारी मिरवती । ऐक्या आले श्रीराम वदनीं ॥४४॥ जीव शिव विभाग जनीं । तैसे देखा अधर[२६] दोनी । मिनले[२७] मिळणीं एकत्वें ॥४५॥ निवटोनियां[२८] नास्तिक्य[२९] । अवक्र[३०] जें का आस्तिक्य[३१] । तेंचि श्रीरामाचे नासिक । शोभेचे बिक[३२] शोभवी ॥४६॥ चालता जितुका वाय जाण । तोचि श्रीरामाचा मुख्य प्राण । तेंचि वेदाचें जन्मस्थान । त्रिकांड पूर्ण प्रतापें ॥४७॥ चैतन्याचें[३३] देखणेपण । त्याच्या डोळां आलें शरण । देखणें देखे देखणा होऊन । देखणेपण सबाह्य ॥४८॥ स्वानंदे निडारली[३४] दृष्टी । चिन्मात्रैक[३५] देखे सृष्टी । देखणेपणा आणिली पुष्टी । दृश्य पाठी पोटी द्रष्टाच देखे ॥४९॥ दीपामागें पडसाई[३६] । तैशा डोळ्यांमागें भोवई । व्यंकटी[३७] जयाची विक्षेपभ्रुकटी[३८] । रची ब्रह्मांडांच्या सांडोनिया पाहीं । श्रीरामदेही विनटल्या ॥५०॥

शब्दार्थ - १. निखालस, २. गुडघे, ३. केळीचे, ४. चंद्राची किरणे, चांदणे, ५. मऊ, नरम, ६. कटिप्रदेश, श्रोणी, ७. वेद, ८. सावळ्या, ९. पायातल्या घागऱ्या, १०. निर्दोषपणे, ११. हजार वर्षे, १२, तळ, बुड, १३. ब्रह्मदेव, १४. वेदशास्त्राला, १५. सिंहाला, १६. रामाच्या कमरेचे कौशल्य, १७. सिंहाला, १८. कमरपट्यांत, करगोट्यांत, १९. नाहीशा होतात, शांत होतात. २०. लहान लहान घंटा, २१. मोत्यांचे घोस, सर, २२. दोषरहित, २३. छाती, २४. अरण्यात राहणारे, तपस्वी, २५. शंखासारखा गळा, २६. ओठ, २७, मिळाले, २८. नाहीसे करून, २९. अनीश्वरत्व. ३०. सरळ. ३१. ईश्वराच्या ठायी श्रद्धा, ३२. तेज बळ, ३३. आत्म्याचे, ३४. परिपक्व झाली, ३५. शुद्ध ज्ञानरूप, ३६. पडछाया, ३७. वांकडेपणा, ३८. दृष्टीचे फेकणे.

कोटी । तेथेंचि राहे व्यंकटी । अगाध दृष्टि श्रीरामाची ।।५१।। पूर्व उत्तर मीमांसा पूर्ण । तेंचि मुख्य श्रीरामश्रवण[1] । श्रवणें श्रवणाचें भूषण । जें निज[2] मंडण वेदांता ।।५२।। कुंडलें म्हणती साकार । एक म्हणती मकराकार । परी ते सत्यत्वें निर्विकार । श्रवणें विकार नासती ।।५३।। श्रवणासी संपूर्ण । सावधानता निजभूषण । सावधानतेवीण जाण । भूषण तें दूषण श्रवणासी ।।५४।। श्रीरामाचें निजश्रवण । वेदशास्त्रांसी निज भूषण । तेथे रिघों[3] न शके दूषण । पावना पावन श्रीराम ।।५५।। जैसें अधिष्ठान[4] निर्मळ । तैसे देखा विशाळ भाळ[5] । ज्याच्या कपाळाची वेळ । सुर सकळ वांछित ।।५६।। उगाळोनि अहंपण । सोहं काढिलें शुद्ध चंदन । तेंही केले रामार्पण । चंदनार्चन ल्लाटी ।।५७ ।। आधींच तो घनसावळां । वरी टिळक रेखिला पिंवळा । शोभा शोभली कपाळा । सुरां सकळां स्वानंद ।।५८।। सच्चिदानंद एकमेळीं। तैसी ल्लाटींची त्रिगुण त्रिवळी । बोधचंदनाचे परिमळीं । पूजिला निर्मळीं निजसज्जनीं ।।५९।। वानूं[6] मुकुटाची महिमा । कैंची उपमा निरुपमा । मुकटमणींची गरिमा[7] । नेणे ब्रह्मा आकळूं तो।।६०।। राम मिरवी लेवूनि लेणें। तो श्रीराम लेणियांचे[8] लेणें । जेवीं सोन सरे सोनटकेपणें । कीं सोनटका सोनेपणें सर्वत्र सरे ।।६१।। लेणें मिरवे सगुणपण । निर्गुण भूषणाहि भूषण । मुळीं निर्गुणे शोभे सगुण । जेवीं लेणें सुवर्ण एकत्वें ।।६२।। ऐसिया श्रीरामाच्या पोटीं । रामरूप देखें सृष्टी । सृष्टी सबाह्य संपुटी । देखे सृष्टी श्रीरामू ।।६३।। ऐसिया देखोनि श्रीरामा । कौसल्येसी आला प्रेमा । त्या सुखाच्या सुखसंभ्रमा । देहधर्मा विसरली ।।६४।। अंग सर्वांगीं रोमांचित । स्वेदबिंदू[9] रवरवीत । चित्त चैतन्यीं विरमत । नेत्रीं स्रवत[10] आनंदाश्रू ।।६५।। स्वानंद न समाये पोटीं । सुखोर्मि बाष्प दाटे कंठीं । उन्मीलित जाली दृष्टी । पडली सृष्टी मूर्च्छित ।।६६।। जेंवि केळीतें झगटे पवन । तैसें शरीर कंपायमान । वाचेसीं पडिले महामौन । देहाभिमान विसरली ।।६७।। सत्वगुणाचें भरितें भरे । तें आपोआप ओसरे[11] । होवोनि सावध चमत्कारें । रामनिर्धारें निर्धारीं ।।६८।।

कौसल्येची विनंती व श्रीरामांचे बालस्वरूप : येणें स्वरूपें रघुनाथा । तुज येथें प्रगट होतां । माझा पुत्र तूं हे कथा । लोकीं सर्वथा मानेना ।।६९।। होईन कौसल्येचा नंदन । तें आठवीं पूर्ववचन । ऐकोनि हांसे रघुनंदन । चमत्कारें पूर्ण तुष्टला ।।७०।। वचन ऐकोनि तत्काळ । श्रीराम स्वयें जाला बाळ । बालार्कप्रभा सुनीळ । सुखकल्लोळ जननयनां ।।७१।। भक्त माझे ऐश्वर्ये वोसंडी । परी चरणामृतीं पडे उडी । तेथें कैसी आहे गोडी । ते आवडी चाखों गेला ।।७२।। चरणकमळींचा अंगुष्ठ[12] । करकमळीं धरोनि स्पष्ट । मुखकमळीं करितां प्रविष्ट । गोडी उद्भट लागली ।।७३।। आपुली आपणियां गोडी । स्वभावें फावली[13] धडफुडी[14] । तोंडींचा अंगुष्ठ न काढी । चोखी आवडी चुरचुरां ।।७४।। माझ्या स्वरूपाची गोडी । भक्तीं भोगिली धडफुडी । चरणामृतीं सुखाच्या कोडी । चोखी आवडी अंगुष्ठ।।७५।। तेंचि लक्षण बालकाचे ठायीं । अद्यापि भासतसे पाहीं । निजांगुष्ठ मुखांचे ठायीं । चोखी लवलाही स्वानंदें ।।७६।।

सार्वत्रिक आनंद व श्रीरामांचे जातक : यापरी रघुनंदना । देखोनि बाळभावना[15] । कौसल्येसी आला पान्हा । जीवीं निंबलोणा[16] करूं पाहे ।।७७।। सुरीं दुंदुभी त्राहाटिल्या[17] भेरी । देव गर्जती जयजयकारी । वर्षती सुमनांच्या[18] हारी । चराचरीं आल्हाद ।।७८।। आनंदाचे लवडसवडीं[19] । नारदाची पडे उडी । सनकादिकांची आडाडी[20] । स्वानंदे तांतडी नाचती ।।७९।। सिद्ध आले श्रेष्ठ श्रेष्ठ। ऋषि आले झडझडाट । वेद होवोनियां

---

शब्दार्थ - १. रामाचे कान, २. निजभूषण, ३. शिरू, ४. ज्यावर कोणतीही वस्तू रहाते ते, आश्रय, ५. कपाळ, ६. वर्णन करू. ७. मोठेपणा, ८. दागिन्यांचे, ९. घाम, १०. वाहू लागले, ११. उतरले, १२. आंगठा, १३. प्राप्त झाली, १४. खरी, १५. बाळस्वरूप, १६. कुरवंडी, १७. वाजविल्या, १८. फुलाच्या, १९. गडबडीने, २०. धांदल.

भाट[1]। अति उद्भट वानिती ॥८०॥ योगी संन्यासी घनदाट । पुण्यकाळाचे दाटले थाट । तीर्थासी तेथें न फुटे वाट । तिहीं शरयूतट वसविलें ॥८१॥ अयोध्येच्या हाटविदी[2] । स्वये झाडिती महासिद्धी । रंगमाळा[3] घालिती सिद्धी । गुढिया समाधी स्वानंदें उभविल्या ॥८२॥ महासामें सुरस गाणीं । चारी मुक्ति त्या नाचणी । साही शास्त्रांची पेंखणी[4]। शब्दश्रेणी[5] स्वपक्षें ॥८३॥ धर्माची पहिली पहाट । स्वानंदाची मोकळी वाट । सुखाची पिकली पेंठ । समयो श्रेष्ठ साधूनी ॥८४॥ कौसल्येसी पुत्र जाला । स्वधर्में वाधावा[6] आणिला । राजा हर्षें निर्भर जाहला । वोसंडला[7] स्वानंदें ॥८५॥ त्राहाटिल्या[8] निशाण[9] भेरी[10]। गगन गर्जे मंगळतुरीं । त्रैलोक्य गर्जे जयजयकारी । घरोघरीं उल्लासु ॥८६॥ मंगळजळीं निजनिवाडें । राजा स्नान करी वाडेंकोडे । तो शिंतोडा लागे जिकडे तिकडे । पूर्वज तिकडे सुखरूप होती ॥८७॥ पूर्वज स्वयें सुखी होती । हेंचि आश्चर्य सांगों किती । तेणें जळे त्रिजगती । उल्लासती स्वानंदे ॥८८॥ पुत्रानंदे उदार दृष्टी । सवत्स गोधनांच्या[11] थाटी । अश्व रथ गज धन कोटी । वांटिता सृष्टी मागता सरे ॥८९॥ जन्म पावला रघुनाथ । उदार दानें दे दशरथ । मागते मागणें हरपत । होवोनि कृतार्थ मागणें विसरे ॥९०॥ दशरथ म्हणे ये समयीं । जो जें मागेल ते देईन पाहीं । तंव मागतेचि जाले नाहीं । याचकां देहीं संतृप्ति ॥९१॥ ऐसें श्रीरामपुत्र मुख । देखता रायासी परम हरिख । द्विज निर्भर केले देख । तृप्त याचक[12] अति दानें ॥९२॥ श्रीरामाचे जातक । दशरथ करी अलोकिक । तवं द्वितीय पुत्राचा हरिख । सद्भावें देख आणिली गुढी ॥९३॥

सुमित्रेची प्रसूती व जन्मोत्सव : सुमित्रा देखे स्वप्न । मज झालें पुत्ररत्न । जागृतीं पाहे सावधान । तंव पुत्रनिधान सेजेसीं ॥९४॥ क्षीरसागरींहूनि निघाला । राम कौसल्यागर्भा आला । पाठीचा शेष पाठीं पावला । पाठींचा झाला सुमित्र ॥९५॥ श्रीरामासी सुष्ठु[13] मैत्री । चालवील निजनिर्धारीं । सुमित्र म्हणणें यापरी । सुमित्राउदरीं जन्मला ॥९६॥ कौसल्येसीं सुष्ठु मित्रा । चालवी यालागीं सुमित्रा । हाही आला तिच्या उदरा । सुमित्र खरा येणेंही ॥९७॥ लक्ष्मण शेषावतार । अयोनि जन्मला निर्धार । तोही नातळे योनिद्वार । जन्मव्यवहार स्वलीला ॥९८॥ तें देखोनि पुत्रवदन । अष्टांगीं पावली समाधान । मन जालें आनंदघन । सुमित्रा संपूर्ण सुखरूप जाली ॥९९॥ यावरी आनंद चढोवढीं । हर्षाचिया लवडसवडीं । सद्भावें उभविली गुढी । रायासी आवडी पुत्रसुख सांगे ॥१००॥ द्वितीय पुत्राचा प्रभाव । ऐकोनि सुखें सुखावे राव । घेवोनियां ऋषिसमुदाव । जातकार्था पाहों स्वानंदे आला ॥१॥ फोडिलीं धनाचीं भांडारें । मुक्त केलीं धान्यकोठारें । त्यागिली गाईंचीं खिल्लारें । लुलु[14] दानभारें मूर्च्छित जाली ॥२॥ याञ्चा[15] बुडाली दानसमुद्रीं । दरिद्र बुडालें दातृत्वपूरीं । माग त्यांचा दुष्काळ नगरीं । घरोघरी आनंद ॥३॥

कैकेयीस पुत्रप्राप्ती : कैकेयी पुत्रवंती दो पुत्रीं । तिची प्रसूतीची थोरी । अतिशयेंसीं नवलपरी । निजनिर्धारीं अवधारा ॥४॥ कैकेयीसीं लागली सुषुप्ती । पुत्र जन्मले कैशा रीती । त्या पुत्रजन्माची ख्याती । तिसीं तें स्थिती अलक्ष ॥५॥ एक श्रीरामाचा भाग । एक लक्ष्मणाचा विभाग । दोन्ही लीलाविग्रही[16] सांग । योनीचें अंग नातळती ॥६॥ सख्या प्रबोधिती[17] कैकेयीसी । दोघे पुत्र जन्मले कुशी । तुझी झोंप ऐसी कैसी । पुत्रसुखासी अनोळख ॥७॥ कैकेयी पाहे पुत्रमुख । हृदयीं वोसंडेना[18] हरिख । सापत्नभावाचें[19] सुख । लोकदृष्टी देख पावती जाली ॥८॥ पूर्ण कळवळा नाही मना । स्वानंदस्नेह नयेचि पान्हा । दाईच्यापरी स्तनपाना ।

शब्दार्थ - १. स्तुतिपाठ, २. बाजार आणि रस्ते, ३. रांगोळ्या, ४. पाहणे, ५. शब्दसमुदाय, ६. वार्ता, निरोप, ७. भरला, परिपूर्ण झाला, ८. वाजविल्या, ९. एक प्रकारचे वाद्य, १०. नगारे, ११. गाईंचे समुदाय, १२. भिकारी, १३. उत्तम, १४. लोभी, १५. याचना, १६. आपल्या इच्छेने जन्म घेणारे, १७. जाग्या करतात, १८. मावेना, १९. सावत्र आई.

लाविले स्तना पुत्र दोनी ॥९१॥ स्पर्पिंडगर्भ तिचा नव्हे । परभाग गर्भे सापत्नमाये । तिचे स्तनपानें पाहें । स्वभावें दायी हे जाली ॥११०॥ पुढें सहजचि सापत्न । पुत्र नायकती तिचें वचन । पुत्रांचे निजसमाधान । कैकेयी जाण पावेना ॥११॥ कैकेयीची गर्भस्थिती । पुत्रद्वयाची उत्पत्ती । यापरि जाली प्रसूती । वाधावा[१] रायाप्रति धाडिला तिणें ॥१२॥ स्नेहाचिया लवड-सवडी । सकामकामाचिया आवडी । पुत्रद्वयाची गर्वगोडी । कैकेयी धाडी रायापासी ॥१३॥ पुत्रद्वयाचें प्रिय जन्म । तेणें रायासी सुख परम । उदारहस्तें करोनि धर्म । जातककर्म तेणें केलें ॥१४॥

पुत्रचतुष्ट्याची दशरथाला प्राप्ती : जेंवि कां चारी पुरुषार्थ[२]। एके काळें घरा येत । तेंवि चारी पुत्र दशरथ । जाले प्राप्त समकाळें ॥१५॥ चहूं मुक्तींचे सुख एक । तेंचि चतुर्विध होवोनि देख । दशरथासी द्यावया सुख । चारी अलौकिक पुत्र जन्मले ॥१६॥ सच्चिदानंद तिन्ही जाण । तिहींचे प्रकाशक वस्तु चिद्घन । तेंवि चारी पुत्र परिपूर्ण । पावला आपण स्वयें राव ॥१७॥ प्रणव[३] तेचि वेद चारी । तेवीं एक वस्तु चौं प्रकारीं । पुत्रत्वें दशरथाचे घरीं । सुखकारी सर्वांसी ॥१८॥ एक सुख नित्य निश्चिती । त्यासी बहुविध चतुष्ट्य म्हणती । तेचि हे चारी मूर्ती । पुत्रसुखार्थी दशरथ ॥१९॥ जो सकळ जगाचा निजविश्राम । सकळ सुखाचा आराम । जो निष्कामाचा पूर्ण काम । तो श्रीराम दशरथात्मज ॥१२०॥ सकळ लक्षां अलक्षण । तो सकळ लक्षणीं संपूर्ण । तोचि तो लक्ष्मण जाण । सुमित्रानंदन दशरथात्मज ॥२१॥ ज्याचेनि सकळही पदार्थ । सदासर्वदा संपूर्ण भरित । ते वस्तूसी म्हणती भरत । कैकयीसुत दशरथात्मज ॥२२॥ मनुष्य शत्रूचें हनन । करी तो अल्प शत्रुघ्न । भवशत्रूचे[४] निर्दळण । करी तो शत्रुघ्न दशरथात्मज ॥२३॥ कनिष्ठ कैकयीचे नंदन । त्यांचे नाम भरत शत्रुघ्न । वसिष्ठें केले नामाभिधान । चौथे जण दाशरथि ॥२४॥

चारही पुत्रांचे नामकरण : श्रीवसिष्ठें आवश्यक । केले चौघांचे जातक । जन्मपत्रिका केली देख । नाम निर्दोष जगद्वंद्य ॥२५॥ यापरि श्रीराम आणि लक्ष्मण । भरत आणि शत्रुघ्न । चौघे दशरथनंदन । नामाभिधान जगद्वंद्य ॥२६॥ यापरी श्रीरामाचें जन्म । सांगितला अनुक्रम । निरूपिलें जन्मकर्म । चरित्रानुक्रम अवधारा ॥२७॥ येथोनि श्रीरामाचें चरित्र । अगाध अनुपम्य पवित्र । धन्य वाल्मीकीचें वक्त्र[५] । कथा पवित्र शतकोटी ॥२८॥ एका जनार्दना शरण । पूर्ण जालें जन्मकथन । पुढें स्वानंदनिरूपण । श्रोती अवधान मज द्यावें ॥२९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीरामजन्मप्रसंगनिरूपणं नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥ ओव्या ॥१२९॥

## अध्याय सातवा

### श्रीरामांची तीर्थयात्रा

श्री सद्गुरुरामचंद्राय नमः ॥ धन्य रामायण सृष्टीं । धन्य वाल्मीकाची वाग्वृष्टी । अक्षरीं अक्षरपरिपाटी[६] । दोष कोट्यनुकोटी नासती ॥१॥ नासती महापातकें । नासती द्वंद्वें[७] दुःखे । रामकथा ऐकतां हरिखें । सुख महासुखें थोरावे ॥२॥ येथोनि श्रीरामचरित्र । अपवित्रा करी अति पवित्र । कथाकौतुक अति विचित्र । श्रोतीं सादर परिसावें ॥३॥

श्रीरामजन्माने लंकेत घडलेल्या अशुभसूचक घटना : श्रीराम जन्मला अयोध्यापुरीं । तंव वीज पडे लंकेवरी । भूस्फोटन[८] नगरद्वारीं । भूकंप नगरीं त्रिकेटेंसीं ॥४॥ रावण जंव भद्रीं[९] चढे । तंव मुकुट पायरीवरी पडे । वायुघातें छत्र मोडे । सभेचे हुडे खचोनि पडती ॥५॥ कुंभकर्णाच्या घरावरी । दिवाभीत[१०] घूं घूं करी । इंद्रजित आरशाभीतरीं । देखे आशिर शरीर ॥६॥ मंदोदरीची

---

शब्दार्थ - १. निरोप, २. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष, ३. ॐकार, ४. संसाररूपी शत्रूचे, ५. मुख, तोंड, ६. अक्षराची रचना, ७. सुख-दुःख, हर्ष-शोक, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्वे, ८. पृथ्वीचे फाटणे. ९. सिंहासनावर, १० घुबड.

गळसरी । तुटोनि पडे अग्निभीतरीं । तीतें काढी जंव सुंदरी । तंव भस्म करी हुताशन ॥७॥ ऐसा विघ्नांचा आवर्त[१] । तेणें राणिवसां[२] आक्रांत । येणें राक्षसकुळा घात । हाहाभूत[३] निशाचर ॥८॥ रावण सांगे भयेंकरीं । दृढपणें असा रे नगरीं । येथोनि कोणीं न जावें दूरी । अहोरात्रीं सावधान ॥९॥ प्रधानादिक सभानायक । तिहीं थोर घेतला धाक । रावणा लागली धुकधुक । अरिष्ट आत्यंतिक देखोनी ॥१०॥

कुमारांचे व्रतबंधादि संस्कार व अध्ययन : येरीकडे अयोध्येसीं जाण । श्रीवसिष्ठ आपण । चौघां कुमारांचे विधान । संस्कारपूर्ण करवता जाला ॥११॥ जातकर्म नामाभिधान[४] । कटिसूत्र अन्नप्राशन । चौलकर्म वायनदान । केले संपूर्ण विधियुक्त ॥१२॥ ऐश्वर्याचे आविष्कारें[५] । व्रतबंधाचेनि गजरें । दानें सन्मानें सत्पात्रें । सुखी नृपवरें यापरी केले ॥१३॥ रामाचा व्रतबंध । सुखी केले विप्रवृंद[६] । स्वानंदे निघालें दोंद । डोलत परमानंद पावले ॥१४॥ श्रीरामाचें व्रतबंधन । सुखी केले अकिंचन[७] । वणवण[८] निमाली पूर्ण । मागतेपण[९] मुक्त जालें ॥१५॥ जालिया व्रतबंधन । वसिष्ठापासीं चौघे जाण । आरंभिलें वेदाध्ययन । शास्त्रव्याख्यान वेदांत ॥१६॥ श्रीराम वेदाचें जन्मस्थान । त्यासी संस्कारमंत्रें जाण । पठन जालें शास्त्र संपूर्ण । अगाधपण प्रज्ञेचें[१०] ॥१७॥ यापरी रघुनाथासी जाण । जालीं षोडश वर्षें संपूर्ण । करावया तीर्थाभिरामन[११] । रघुनंदन उद्यत[१२] ॥१८॥ प्रार्थूनि वसिष्ठातें । त्या सद्गुरूच्या अनुमतें । आज्ञा मागोनि दशरथातें । श्रीराम तीर्थातें निघाला ॥१९॥ मग पाहोनियां सुदिन । स्वस्तिवादु पुण्याहवाचन । सवें देवोनियां सैन्य । सुबुद्धिप्रधानसमवेत ॥२०॥ दिधलीं अक्षयी भांडारें । सवत्स गाईंची खिल्लारें । नाना प्रकारचीं वस्त्रें । तीर्थीं रघुवीरें वांटावया ॥२१॥

तीर्थयात्रावर्णन : सरें[१३] सरितां[१४] सिंधुसंगम । पुण्यभूमि पुण्याश्रम । केले प्रयागादि पंचग्राम । मार्ग दुर्गम हिमालया ॥२२॥ बदरीमार्गीं पंचप्रयाग । वेदप्रयाग शिवप्रयाग । कर्णप्रयाग ब्रह्मप्रयाग । अतिगुप्तप्रयाग पांचवा ॥२३॥ शरयू गंगा सुवर्णभद्रा तिन्हीं । हे पूर्व प्रयोग त्रिवेणी । कार्तिक मासीं कृष्णा वेणी । मुख्य त्रिवेणी माघस्नान ॥२४॥ वनें तपोवनें शैलशिखरें[१५] । परम पावन जें जे उखरें[१६] । तीर्थादि तिन्ही पुष्करें । तीर्थक्षेत्रें विधियुक्त ॥२५॥ नैमिषारण्य धर्मारण्य । चंपकारण्य ब्रह्मारण्य । महापंथाचें वेदारण्य । ऋषि वेदज्ञ जेथें असती ॥२६॥ मंदराद्रि आणि विंध्याद्रि । मूळपीठींचा सह्याद्रि । गंगातीरींचा ब्रह्माद्रि । लोकोत्तरीं अति श्रेष्ठ ॥२७॥ प्राची सरस्वती बिंदुसर । धर्मालय कुरुक्षेत्र । ज्वाळामुखी ज्वाळा दुर्धर । अति पवित्र तीर्थोदकीं ॥२८॥ केलें तिन्हीं गयेंचे दर्शन । धर्मस्तंभांचे स्पर्शन । ब्रह्मयोनीचें अवलोकन । गायत्रींचे ध्यान संध्यावटीं ॥२९॥ ब्रह्मावर्त गोमतीतीर । हिरण्यासहित सागर । सागरावर्ती शंखोद्धार । जेथें वेदोद्धार करी हरि ॥३०॥ सप्तपुरी तीर्थमार्गें । केलीं बाराही ज्योतिर्लिंगें । प्रभासेंसीं सोमनाथयोगें । पंचकृष्णाप्रयोगें मूळमाधव ॥३१॥ द्वारकेचा कल्याणकृष्ण । दुजा शंखनारायण । तिजा पिंडारकी काळकृष्ण । चौथा तो जाण गडदामोदर ॥३२॥ मूळचें निज मूळस्थान । मूळमाधव पांचा कृष्ण । हें तंव यात्रामंडळगमन । पुण्य पावन सर्वांसी ॥३३॥ गंडकी यमुना सुरसुरी । तापी नर्मदा मस्त्योदरी । कृष्णा भीमा गोदावरी । दरितें[१७] दुरी ज्याचेनी ॥३४॥ मत्स्यतीर्थ पक्षितीर्थ । शिवकांची विष्णुकांचीयुक्त । त्रिकोण हस्ति तीर्थभूत। तीर्थ विख्यात कुंभकोण ॥३५॥ प्रतीची कावेरी ताम्रपर्णी । कृतमाला पयस्विनी ।

---

शब्दार्थ - १. विघ्नांचा भोवरा, २. अंत:पुरात, जनानखान्यात, ३. अपरिहार्य, ४. नावे ठेवणे, ५. बलाने, जोराने, ६. ब्राह्मणसमुदाय, ७. अतिदरिद्री, भिकारी, ८. दगदग, ९. याचना, १०. बुद्धीचे, ११. तीर्थयात्रा, १२. तयार, १३. सरोवरे, १४. नद्या, १५. पर्वतांची शिखरे, १६. भरड, नापीक जमीन, माळजमीन, १७. पापे.

या पंचनद्यांच्या स्नानीं । भगवद्भजनीं दृढभाव ॥३६॥ कन्याकुमारी जनार्दन । शेषशायीं अनंतशयन । उभय कावेरी श्रीरंगस्थान । परम पावन अगस्त्याश्रम ॥३७॥ दर्शनें मुक्ति चिदंबरीं पाहीं । जन्ममुक्ती कमलालयीं । मरणमुक्ति काशीच्या ठायीं । स्मरणें मुक्ति देई अरुणाचळ ॥३८॥

**श्रीरामांचा लोकसंग्रह :** श्रीराम तीर्थां तीर्थभूत । मोक्षा मुक्ति श्रीरघुनाथ । तोही तीर्थयात्रा करित । लोकसंग्रहार्थ[1] स्वलीला ॥३९॥ जे तीर्थीं जे विधान । जे तीर्थीं जे स्नान । तैसें करोनि दान सन्मान । सुखी जन श्रीरामें केले ॥४०॥ श्रीरामें सुखी केले महाऋषी । रामें सुखी केले संन्यासी । रामें सुखी केले तीर्थवासी । सुखी वनवासी श्रीरामें केले ॥४१॥ रामें सुखी केले त्यागी । रामें सुखी केले भोगी । रामें सुखी केले विरागी । सुख संभोगी श्रीराम ॥४२॥ रामे सुखी केले ब्रह्मचारी । रामें सुखी केले व्रतधारी । रामें सुखी केल्या नरनारी । राम सुखकारी सर्वांसी ॥४३॥ रामें सुखी केले तपी । रामें सुखी केले जपी । रामें सुखी केले निर्विकल्पी । सुखरूप श्रीराम ॥४४॥ रामें सुखी केले दिगंबर[2] । रामें सुखी केले वल्कलधर[3] । रामें सुखी केले सदाचार। सुख साचार श्रीराम ॥४५॥ रामें सुखी केले अयाचित[4] । रामें सुखी केले अति विरक्त[5] । रामें सुखी केले धर्मासक्त। राम समस्तां सुखकारी ॥४६॥ रामें सुखी केले अकिंचन[6] । रामें सुखी केले अति दीन । रामें सुखी केले अज्ञान । राम सकळसुजनसुखकारी ॥४७॥ रामें सूखी केले कापडी[7] । रामें सुखी केलीं बापडीं । रामें सुखी केलीं सावडीं[8] । सुखाची कुळवाडी श्रीराम ॥४८॥ रामें सुखी केले सेवक । रामें सुखी केले केवळ रंक । रामें सुखी केले लोक । जे भावें सन्मुख भेटों आले ॥४९॥ रामें सुखी केले विवेकी । रामें सुखी केले एकाकी । रामें सुखी केले त्रैलोक्यीं । यात्रानुलोकीं स्वलीला ॥५०॥ यात्रा विधियुक्तप्रकारें । स्वलीला रघुवीरें । नाना जनां दानप्रकारें । चहू समुद्रीं सुखी केले ॥५१॥ द्वारका पश्चिमसमुद्र । जगन्नाथ पूर्वसमुद्र । मानसरोवर उत्तर समुद्र । दक्षिणसमुद्र श्रीसेतुबंध ॥५२॥ यापरि समुद्रवलयांकित[9] । तीर्थें करोनियां समस्त । अयोध्ये आला रघुनाथ । सुमुहूर्तें स्वानंदें ॥५३॥ नगर श्रृंगारिले नृपवरें । गुढिया तोरणें मखरें । गगन गर्जे जयजयकारें । आणिला गजरें रघुनाथ ॥५४॥ भाट गर्जती गहिरावचनीं[10] । पुढें नाचती नाचणी[11] । कीर्ति वर्णिजे बंदिजनीं[12] । अयोध्याभुवनीं उल्लास ॥५५॥ पदोपदीं ओंवाळणी । पदोंपदीं सुवासिनी । पदोपदीं अक्षयवाणी[13] । मंत्रध्वनी स्वरयुक्त ॥५६॥ वसिष्ठासी घातलें लोटांगण । दशरथा साष्टांग नमन । चौघांसी दिधले आलिंगन । परम समाधान रायासी ॥५७॥ अभिवंदिल्या तिघी माता । हर्ष दशरथाचे चित्ता । उत्संगीं[14] बैसविले रघुनाथा । सुख समस्तां अपार ॥५८॥ चौघां करविलें मंगळस्नान । दिव्यांबरें[15] परिधान[16] । दिव्यालंकार चंदन । सुमनीं सुमन शृंगारिले ॥५९॥ वसिष्ठवचन प्रमाण । केले व्रतविसर्जन। द्विजां दिधले भोजन । दानसन्मानसमारंभें ॥६०॥ यापरी तीर्थाभिगमन[17] । करूनि आला रघुनंदन । येथोनि वैराग्य पूर्ण । श्रीराम आपण विन्यासें[18] दावी ॥६१॥ येथोनि कथा मनोहर । गुह्य ज्ञानें ज्ञानगंभीर । स्वयें निरूपील रघुवीर । वैराग्यविचार मुमुक्षुहेतु ॥६२॥ मुमुक्षु[19] तारावया संसार । दावी वैराग्य निजसार । धर्मलक्षणीं अवतार। सत्य साचार श्रीराम ॥६३॥ एका जनार्दनीं एक । कवीश्वराचें अति रंक । त्या मूर्खाचेनि मुखें देख । कथा अलोलिक श्रीराम वदवी ॥६४॥ स्वस्ति श्रीभावार्थेरामायणे बालकांडे एककारटीकायां श्रीरामतीर्थयात्रागमनं नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥ ओंव्या ॥६४॥

---

शब्दार्थ - १. लोकांनी कर्माला प्रवृत्त होण्यासाठी, लोकाचाराकरिता, २. नग्न, ३. वल्कले (झाडांच्या साली) धारण करणारे, ४. कोणापाशी न मागता ईश्वरेच्छेने जे मिळेल त्यावर चरितार्थ चालविणारे, ५. निरिच्छ, ६. अति दरिद्री, ७. तीर्थयात्रा करणारे, ८. गरीब, दुबळी, ९. समुद्राने वेष्टिलेल्या सर्व पृथ्वीवरील, १०. गंभीर वचनाने, ११. कलावंतिणी, १२. भाटांनी, १३. आरत्या, १४. मांडीवर, १५. उत्तम वस्त्रे, १६. नेसणे, १७. तीर्थयात्रा, १८. आचरण करून, क्रमेकरून, १९. मोक्षाची इच्छा करणारे.

## अध्याय आठवा

विश्वामित्रांचे आगमन : श्रीरामचंद्राय नमः ॥ श्रीराम सच्चिदानंदघन । तोही वैराग्यलक्षण । लोकलक्षणार्थ[1] दावी आपण । दीन जन तारावया ॥१॥ सकळ वैराग्याचे फळ । स्वयें श्रीराम केवळ । तोही वैराग्याचें शीळ[2] । दावी प्रबळ लोकोपकारा ॥२॥

श्रीरामांची अनासक्ती : तीर्थाहूनि आलिया रघुनाथ । नावडे राज्य राज्यार्थ । नावडे लोक लोकार्थ । विषयस्वार्थ नावडे ॥३॥ नावडे इंद्रियांचा संग । नावडे इंद्रियांचा भोग । नावडे इंद्रियप्रयोग । अति विराग अनुतापी[3] ॥४॥ नावडे प्रवृत्तिक्रियाकर्म[4] । नावडे देहादि देहधर्म । नावडे विलाससंभ्रम । वैराग्य परम अनुतापी ॥५॥ नावडे स्त्रियांची भेटी । नावडे स्त्रियांसीं गोष्टी । नावडे स्त्रियां पाहों दृष्टी । वैराग्य पोटीं विषयांचें ॥६॥ नावडे शाब्दिक चावट[5] । नावडे चातुर्य वटवट । नावडे अतिवाद खटपट । मौननिष्ठ अनुतापी ॥७॥ नावडे कळा कौतुक चांग । नावडे गीत नृत्य शुभांग । नावडे पारधी राजरंग । वैराग्य सांग अनुतापी ॥८॥ नावडे संग्रहो धनधान्य । नावडे संपदा पदाभिमान । नावडे मान सन्मान । वैराग्य पूर्ण अनुतापी ॥९॥ नावडे तया कल्पतरू । तो तंव कल्पनेचा सागरू । कल्पना सबळ संसारू । अति दुस्तरू जन्ममरण ॥१०॥ केवळ चिंतायुक्त चिंतामणी । चिंता चिता समान दोनी । चिता निर्जीवा दाहिनी[6] । चिंता अनुदिनीं[7] जित्यातें जाळी ॥११॥ नावडे परिस धातु अर्थ । अर्थ तितुका होय अनर्थ । ज्याचे पोटीं अर्थस्वार्थ । त्यासी परमार्थ कदा न भेटे ॥१२॥ कामधेनु नावडे मनींहून । तें कामनेचें अधिष्ठान[8] । कामकामें भवबंधन । वैराग्य पूर्ण नावडे तेंही ॥१३॥ ऐसे दिव्य भोग समस्त । त्यांसी श्रीराम अनासक्त[9] । सदा वसवी एकांत । अनंत अव्यक्त रहिवासी ॥१४॥

विश्वामित्रांचे आगमन : दशरथाचे सुपुत्र । ऐकोनियां विश्वामित्र । ऋषीश्वरांमाजि पवित्र । आला सत्वर यज्ञसिद्ध्यर्था ॥१५॥ आला ऐकोनि विश्वामित्र । सामोरा धांवे नृपवर । लोटांगणीं नमस्कार । हर्षे निर्भर गृहा आणी ॥१६॥ घालोनियां वरासन । मधुपर्क विधिविधान । सुवर्ण-सुमनें केले पूजन । सुखसंपन्न ऋषि जाला ॥१७॥ वसिष्ठविश्वामित्रां भेटी । आलिंगनीं पडली मिठी । दोघांची एकात्वें एक दृष्टी । दोघांचे पोटीं सुख एक ॥१८॥ दोघांचे एक कर्माचरण । दोघांचे एक अनुष्ठान । दोघांचे एक ब्रह्मज्ञान । एकत्वें पूर्ण दोघे जण ॥१९॥ दशरथाचे सभास्थानीं । दोघे बैसले एकासनीं । तेणें शोभली ते अवनी[10] । जेवीं गगनी शशिसूर्य ॥२०॥ दशरथ म्हणे विश्वामित्रा । तूं होसी प्रतिसृष्टीचा धात्रा[11] । उद्धरावया कुळगोत्रा । परम पवित्रा आलासी ॥२१॥ धन्य भाग्याचे आजी आम्ही । धन्य अयोध्येची भूमी । जे कृपेनें आलेती तुम्ही । जे व्रत जपें तपे न भेटां ॥२२॥ जेथे संतोषोनि साधु आले । तेथें कल्याण मुसावलें[12] । तीर्थांचें फळ तेंही पावले । भवाब्धीचें[13] भलें पार उतारूं ॥२३॥ जेथें तुमची कृपादृष्टि पाहे । तेथे भगवंत अवश्य आहे । जगद्वंद्य तुझे पाय । बहु मी काय अनुवादूं[14] ॥२४॥

दशरथाचे विश्वामित्रांना अभिवचन : संतोषोनि बोले दशरथ । विश्वामित्रा तुझें मनोगत । सिद्धी पाववीन समस्त । हें निश्चितार्थ मद्वाक्य ॥२५॥ जे जे तुझे मनोरथ । ते ते जाण म्यां केले कृतार्थ । तेणें वाक्यें संतोषयुक्त । स्वयें बोलत विश्वामित्र ॥२६॥

---

शब्दार्थ – १. लोकसंग्रहाकरिता, २. आचरण, ३. पश्चातापी, वैराग्यशील, ४. संसारांतील कर्मे, ५. चावटपणा, ६. जाळणारी, ७. दररोज, ८. निवासस्थान, ९. विनमस्क, १०. भूमी, ११. उत्पत्तीकर्ता, १२. प्राप्त झाले, एकत्र झाले, १३. संसारसागराचे, १४. बोलू.

दशरथाची स्तुती : दशरथा तुझें औदार्य । धैर्य वीर्य गुण गांभीर्य । तुझ्या पुरुषार्थाचें शौर्य । सुरवर[1] स्वर्गी वानिताती[2] ॥२७॥ रणीं जिंकोनि शुक्रासी । सुखी केले देवगुरूसी । यश दिधलें इंद्रासी । तूं सूर्यवंशासी मंडन ॥२८॥ ऐकोनि ऋषीची वचनोक्ती । राजा सुखावला चित्तीं । त्या सुखाची सुखस्फूर्ती । काय ऋषीप्रती बोलत ॥२९॥ होवोनि अति विनीत[3] । जोडोनियां दोनी हस्त । ऋषीचा कृतकार्यार्थ । असे पुसत स्वानंदे ॥३०॥ गायत्रीमंत्र कृतकार्या । विश्वामित्रा ऋषिवर्या । तूं आलासी कोणा कार्या । महाधैर्या मज सांग ॥३१॥

विश्वामित्रांची पुत्रयाचना : म्हणे सूर्यवंशी महावर्या । ऐकें नृपा परोपकारिया । सुरसिद्धकृतकार्या । मागणें राया अवधारीं ॥३२॥ माझें मागणें नव्हे वित्त । माझें मागणें नव्हे प्राकृत । माझें मागणें रघुनाथ । यज्ञसिद्ध्यर्थ कृतकार्या ॥३३॥ ऐकोनि ऋषींचें वचन । गजबजिले रायाचें मन । वीर्य गेलें हरपोन । कंपायमान सर्वांगीं ॥३४॥ सर्पकपाळीं कांटा नेहटे[4] । कां सापसुरळीचें[5] पुच्छ तुटे । मासा जळावेगळा फुटे । तैसे दुःख वाटे रायासी ॥३५॥ चणे वानरा गालींचे । कां धन जैसें कृपणाचें । भाणें[6] नेले भगणाचें[7] । तैसे मन रायाचें श्रीरामीं ॥३६॥ प्राण जातां देह विकळ । मन मूर्च्छित इंद्रियें बरळ[8] । राम जातांचि तत्काळ । रायासी केवळ दैन्य तैसें ॥३७॥ वाचेसी पडले दृढ मौन । ऋषीसी नेदी प्रतिवचन । समयाचें चातुर्यज्ञान । विचारून बोलत ॥३८॥

दशरथाचे उत्तर : म्हणे यज्ञा विघ्न करिती राक्षस । मनुष्यमारक कर्कश । राम केवळ बाळवेष राजस । धनुर्विद्याभ्यास नाहीं केला ॥३९॥ नाहीं रणांगण देखिलें । नाहीं पूर्वी युद्ध जाले । त्यासी राक्षसासी पहिले । युद्ध करविलें केवीं जाय ॥४०॥ मी केवळ पुत्रकृपण । श्रीराम माझें निजनधान[9] । श्रीराम माझें जीवन धन । तो न देववे दान राक्षसभक्षा ॥४१॥ श्रीरामाचा प्रथम संबंध । तोही राक्षसांसी द्वंद्वयुद्ध । तुम्ही विचारविशद[10] । ज्ञानप्रबुद्ध[11] तुम्ही आहा ॥४२॥ श्रीराम केवळ बाळ । नाहीं शस्त्रविद्याप्रबळ । नाहीं मंत्रास्त्रशुद्धशीळ । त्यासी युद्ध प्रबळ राक्षसांसीं केवीं ॥४३॥ जें जे मागाल तुम्ही समर्थ । देईं राज्य राजपदार्थ । शेखीं[12] देईन जीवित्व । परि रघुनाथ न देववे ॥४४॥

विश्वामित्रांचा संताप : ऐकोनि रायांचे वचन । विश्वामित्र जाला कोपायमान । अत्यंत क्षोभोनियां जाण । काय वचन आपण बोलत ॥४५॥ अरे मी भेटलों दशरथ । द्विजा तुझे मनोरथ । आजीच जालें कृतकार्यार्थ । ऐसें सभेआंत जल्पसी[13] ॥४६॥ तेंचि मागतां दान । न देववे म्हणसी आपण । हेंचि मुख्यत्वें कुळदूषण । दिधलें दान न देववे म्हणसी ॥४७॥

प्रतिज्ञापूर्तीसाठी प्राणार्पण केलेल्या सूर्यकुलोत्पन्न राजांची दशरथाला आठवण देतात : सूर्यवंशी राजे जाण । जे जे जाले धर्मभूषण । त्यांमाजी तूं धर्मदूषण । दिधले दान न देववे म्हणसी ॥४८॥ हरिश्चंद्रे स्वप्नदान । जागृती सत्य केले संपूर्ण । आपणा विकिलें आपण । दक्षिणावचनसत्यत्वें ॥४९॥ त्या वंशी तूं जन्मलासी । दिधले दान तें न देसी । हें सामर्थ्य तुजचिपासीं । सूर्यवंशासी निंदका ॥५०॥ येच वंशीं शिबी जाण । पक्षियाचेनि समसमान । मांस तुकिलें[14] आपण । परी मिथ्या वचन न करीच ॥५१॥ येचि वंशी मुचकुंद जाण । इंद्रा साह्य केलें आपण । तेणें युद्ध केलें दारुण । रणकंदन तारकेंसीं ॥५२॥ ते वंशी तूं जन्मोनि जाण । दान न देववे म्हणसी आपण । ते वंशीच्या यशासी पूर्ण । तुवा दूषण[15] लाविलें ॥५३॥

शब्दार्थ - १. मोठे देव, २. वर्णन करतात, ३. नम्र, ४. वेगाने शिरावा, टोचाचा, ५. चोपईचे, ६, ताट, पात्र, ७. भिकाऱ्याचे, ८. विकळ, ९. ठेवा, १०. विचारी, ११. ज्ञानी शहाणे, १२. शेवटी, १३. बडबडतोस, १४. तोलले, वजन केले, १५. कलंक.

रुक्मांगद येच वंशीं । मोहिनींने छळितां त्यासी । पुत्रांचे शीर देवोनि तिसी । व्रत एकादशी उद्धारु ॥५४॥ तूंही तेचि वंशी जन्मलासी । पुत्र न देववे स्वयें म्हणसी । लाज लाविली पूर्वजांसी । उणे सूर्यवंशासी तुझेनि ॥५५॥ ककुत्स्थ बैसला इंद्राचे स्कंधी । दैत्य पराभविले युद्धीं । ते वंशींचा तूं त्रिशुद्धी । म्हणसी पुत्र नेदीं युद्धार्थ ॥५६॥

श्रीरामांना बालक म्हटल्याबद्दल राजाला दोष : तूं रामासी म्हणसी बाळ । हे मूर्ख बुद्धि अति स्थूळ । श्रीराम अवतार निर्मळ । जाण केवळ सुरसाह्या[1] ॥५७॥ श्रीराम नव्हे बाळक । राक्षसकुळासी अंतक[2] । स्वधर्माचा संस्थापक । साधूंचा आवश्यक साहाकारी ॥५८॥ धनुर्विद्या नेणे रघुनंदन । हें वचनचि अति अप्रमाण । राम सकळ विद्यां जन्मस्थान । शस्त्रास्त्रजीवन निजबीज राम ॥५९॥ श्रीराम रणरंगधीर । गुणागुणगुणगंभीर । वीराधिराज महावीर । परम शूर श्रीराम ॥६०॥ श्रीराम मनुष्य नव्हे पाहीं । राम देहींच विदेही । श्रीराम चैतन्यविग्रही[3] । राम स्वदेहीं परब्रह्म ॥६१॥ राया तूं नेणसी निश्चित । श्रीरामा मानिसी प्राकृत । वसिष्ठासी पुसें हा वृत्तांत । तो यथार्थ सांगेल ॥६२॥ आतां स्वस्ति असो तुम्हांसी । सकळ कल्याण श्रीरामासी । मी जाईन स्वाश्रमासी । म्हणोनि ऋषि निघाला ॥६३॥

कुलगुरूंचा उपदेश व विश्वामित्रांना पुत्रसमर्पण : तंव वसिष्ठ म्हणे नृपवरा । क्षोभवूं नको विश्वामित्रा । हा प्रतिसृष्टीचा धात्रा । भस्म कुळगोत्रा क्षणार्धे करील ॥६४॥ धन्य वसिष्ठाचा भाव । सूक्ष्म सुचविला निर्वाह । जेणें सुखावे ऋषि आणि राव । तैसा उपाय चिंतिला ॥६५॥ वसिष्ठ गृहा सांगें रायासी । शांत करी विश्वामित्रासी । दोघे पुत्र द्यावे त्यासी । दोघे पुत्र तुम्हांपासी क्रीडनार्थ ॥६६॥ गुरुआज्ञा वंदूनि शिरसीं । लोटांगण विश्वामित्रासी । रामलक्ष्मण दिधले तुम्हांसी । दोघे मजपासीं राहूं द्या ॥६७॥ विश्वामित्र म्हणे भले जालें । एके रामें काय नव्हें केलें । सवें लक्ष्मणासी दिधले । भाग्य फळले पैं माझे ॥६८॥

विश्वामित्रांचा संतोष व सर्वत्रांना आनंद : विश्वामित्र म्हणे वसिष्ठासी । तू सत्य सद्गुरू सूर्यवंशीं । रक्षिलें दोहींच्या धर्मासी । ज्ञाता होसी सज्ञानत्वें ॥६९॥ वसिष्ठ विश्वामित्र आणि रावो । स्वस्थानीं बैसले पाहा हो । गाधिसुत[4] झाला निःसंदेहो । परम उत्साह स्वानंदें ॥७०॥ राजा म्हणे जिवलगासी । राम पाचारा ऋषिभेटीसी । येरू पातला राजाज्ञेंसीं । अति वेगेंसीं विनीत[5] ॥७१॥ लोटांगण वसिष्ठासी । साष्टांग नमन रायासी । चरणीं माथा विश्वामित्रासी । येरे हृदयासी आलिंगले ॥७२॥ ऋषी रामा जाली भेटी । आनंद विश्वामित्राच्या पोटीं । जालें जयजयकारे गर्जता उठी । श्रीराम दृष्टी देखोनि ॥७३॥ एका जनार्दना शरण । गुरुशिष्यदर्शन । येथोनि श्रीराम आपण । वैराग्य पूर्ण निरूपी ॥७४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां विश्वामित्रागमनं नाम अष्टमोऽध्यायः ॥८॥ ओंव्या ॥७४॥

## अध्याय नववा

श्रीरामांचे वैराग्यनिरूपण : श्रीरामचंद्राय नमः । सन्मुख देखोनि श्रीराम । विश्वामित्राचा मनोधर्म । सुखावोनि सप्रेम । आनंदे परम बोलत ॥१॥ आजी माझें सार्थक कर्म । आजी माझा सफळ धर्म । आजी माझें पूर्ण काम । रायें श्रीराम यज्ञार्थ दिधला ॥२॥ ऋषि म्हणे श्रीरामासी । चाल जाऊं माझ्या आश्रमासी । सिद्धि पाववीं स्वधर्मासी । तूं सर्व कामासी निजमोक्ष[6] ॥३॥ राम म्हणे ऋषि समर्था । कांही पुसेन मनोगता[7] । कृपा करावी कृपावंता । मी तत्वता वचनार्थी ॥४॥

देहदोषांविषयी श्रीरामांचा विश्वामित्रांस प्रश्न : देह तंव अत्यंत अशक्त । देहकर्म तेंही नाशवंत ।

शब्दार्थ - १. देवांना साह्य करण्यासाठी, २. काळ, ३. ज्ञानस्वरूप, ४. विश्वामित्र, ५. नम्र, ६. मुक्ती, ७. इच्छित.

कर्मफळ तें क्षयभूत । सुख कोण येथ देहसंगें ॥५॥ देहलोभें आर्तभूत[1] । जो विषय सेवीत । तो तत्काळ विष्ठा होत । सुख कोण येथ देहसंगें ॥६॥ देहीं काळ लागला नित्य । क्षयो करी अहोरात्र । शेखीं भोगवी जन्ममरणावर्त[2]। सुख कोण येथें देहसंगें ॥७॥ देहा क्षुधेचा मारा नित्य । तृष्णा[3] पीडी जीवनार्थ । देहीं देहभय निभ्रांत । सुख कोण येथ देहसंगे ॥८॥ ऐकें स्वामी साचार । देह तंव दुःखाचा डोंगर । देह विकल्पाचा[4] सागर । देह तो महापूर अति तृष्णेचा[5] ॥९॥ देह नित्य मूत्राची न्हाणी । देह तंव नरकाची खाणी । देह तंव पोहणघाणी[6] । रोगांची श्रेणी[7] हा देह ॥१०॥ देह संदेहाचे सोलींव । देह अहंकाराचें ओतींव । देह विषयांचे भरींव । कृमींचे पेंव[8] तो देह ॥११॥ देह द्वंद्वाची निजधरणी । देह दुःखाची निजनिशाणी । देह विकल्पाची पूर्ण भरणी । अरिष्टांची तो आरणी[9] देह ॥१२॥ देह आशेचा कळवळा । देह अहंकाराचा अमंगळा[10] । देह अहंममतेचा सोहळा । विकाराचा मळा तो देह ॥१३॥ देह अविद्येचें अधिष्ठान । देह संकल्पाचे साजिरें वन । देह मोहकाचें मोहन । मुख्यत्वें अज्ञान तो देह ॥१४॥ देह कामाचा पर्वत गूढ । देह क्रोधाचा अवघड गड[11] । देह लोभाचा दुस्तर आगड[12] । विनाशाचा मठ तो देह ॥१५॥ देह अपवित्रतेचें मूळ । देह कुश्चळा अति कुश्चळ[13] । देह अंगमळां अमंगळ । मुख्य विटाळ तो हा देह ॥१६॥ पहा जो उत्तम पदार्थ आहे । देहलोभें तो भोक्ता खाये । याममात्रें[14] विष्ठा[15] होय । हा देहाचा पाहें परिपाक ॥१७॥ याममात्र न लागतां देख । तत्काळाची होतो वमक[16] । नरकाहूनिया अधिक । चिळसदायक[17] देहसंग ॥१८॥ नित्य विषय सेवितां पूर्ण । नित्य नवी वाढे वणवण । कल्पांती तृप्ति नव्हे जाण । सुख कोण देहसंगे ॥१९॥ क्षुधा नित्य पीडी शरीरीं । तृषा पीडी तेचिपरी । निद्रा सर्वथा मूढ करी । ऐशा देहसंगामाझारी सुख कोण ॥२०॥

**देहाच्या उत्पत्तिस्थितीसंबंधी घृणा :** त्या देहाची उत्पत्ती । ते मी सांगेन स्वामीप्रती । अपवित्रा अपवित्रमूर्ती । देहसंगतीं सर्वार्थी ॥२१॥ रजस्वलेचा लागता पालव[18] । सचैल स्नानाचा उद्भव । त्या अशुद्धाचा[19] ओतीव देह । अपवित्र पहाहो समूळीं ॥२२॥ रजस्वला शुद्ध चवथे दिवसीं । तो विटाळ राहिला गर्भासीं । तोचि वाढोनि नवमांसीं । करी गोत्रासी सूतकी ॥२३॥ विटाळे देहाची संभूती[20] । विटाळे देहाची उत्पत्ती । विटाळें देहाची शांती । देहभस्मांती सूतक राहे ॥२४॥ देहाच्या अस्थि आणि राख । गंगोदकी घालितां देख । देता पिंड तिळोदक । तरी देहसूतक सुटेना ॥२५॥

**गर्भदुःखाचे वर्णन :** एवं देह तो मुख्यत्वें विटाळ । देह तोचि दुःख प्रबळ । आतां गर्भदुःखाचें कल्लोळ । विशद[21] विकळ[22] अवधारा ॥२६॥ रजस्वलेचें पूर्ण रुधिर[23] । तेथे पित्याचें रेतमात्र । तेंचि गोठोनि होय शरीर । मुख्य अपवित्र देहसंग ॥२७॥ जननी[24] जठरीं अग्निमाझारीं । विष्ठेच्या दाथरावरी[25] । मूत्राच्या आधणाभीतरीं । नवमासवरी उकडिजे ॥२८॥ जठराग्नीच्या तोंडीं । उकडतां गर्भाची उंडी । रस मुसावोनि होय पिंडी । अष्टांगांचीं कांडीं व्यक्ती येती ॥२९॥ विष्ठालेप चहूंकडे । नाकीं तोंडी जंतु किडे । तें दुःख भोगिता जीव रडे । अति चरफडे तळमळी ॥३०॥ त्वचा नाहीं गर्भखोळे[26] । तंव मातेसी होती डोहळे । कटुम्ललवण[27] सेवी ते वेळे । सर्वांग होरपळे गर्भाचें ॥३१॥ त्रिकाळ भोजन मातेसी । त्रिकाळ दुःख तें गर्भासीं । भोगितां होय कासाविसी । कोणापासी सांगेल ॥३२॥ तेथें नाहीं वायूंचे आगमन । नाहीं

---

शब्दार्थ - १. दुःखित, २. जन्ममरणरूपी भोवरा, ३. तहान, ४. संशयाचा, भेदाचा, ५. आशेचा, ६. घाणेरडे डबके, ७. पंक्ती, ८. कोठार, ९. रांग, १०. संबंधी, ११. डोंगरी किल्ला, १२. संचय, १३. घाणेरड्यात, १४. प्रहराने, १५. नरक, १६. ओकारी, १७. कंटाळा आणणारा, १८. पदर, १९. रक्तांचा, २०. होणे, संभव, २१. स्पष्ट, २२. शांतपणे, २३. रक्त, २४. आईच्या पोटात, २५. उकाड्यात, २६, गर्भाच्या वेष्टनाला, २७. कडू, आंबट व खारट.

मायदाईचें शांतवन । नाहीं स्वजनांचे समाधान । दुःखें संपूर्ण अति दुःखी ॥३३॥ ते काळची त्याची व्यथा । नेणती ते माता पिता । तेथें नाहीं नाभी[१] म्हणता[२] । आपली दुःखिता आपण भोगी ॥३४॥

प्रसूतिसमयीचा बिकट प्रसंग : प्रसूतिकाळ अति अटक[३] । गुदद्वारीं अधोमुख । योनिद्वारा आणावया देख । परम दुःख उत्पादी ॥३५॥ प्रसूतिवात अति प्रबळ । सर्वांगी लागे एकीचि कळ । योनिद्वारी करी तळमळ । प्रसूति तत्काळ होईना ॥३६॥ वेणेवरी येतां वेणा । दुःख होय दोघांजणां । मातेसी न साहवे वेदना । गर्भघोळणा[४] ते काळीं ॥३७॥ ते काळीं विचार करी पूर्ण । आतां जन्मल्या आपण । विषय सेवितां गर्भी गमन । तें विषय सेवन करीं ना ॥३८॥ सद्गुरूसी रिघोनि शरण । निर्दोळोनियां अभिमान । निवारीन जन्ममरण । तेहि आठवण विसरे देही ॥३९॥

बाळपणीचं दुःख : गर्भ जन्मे बाहेर पडे । सोहंभाव तत्काळ उडे । कोहंभावें दीर्घ रडे । यालागीं जन्मल्यापुढें सुख काय ॥४०॥ जन्मकाळापासोनि देख । आयुष्य जातसे अमोलिक । यालागीं जो तो पुसे जातक । कोणी रहातक पुसेना ॥४१॥ देहासवेंचि जातक । खंड लागलें आवश्यक । यालागीं सकळ लोक । मरणधाक[५] वाहती ॥४२॥ मरणा मर्यादा नाहीं देख । गर्भी गर्भपाताची धुकधुक । उपजतांचि सटवीचा धाक । कोण सुख जन्माचें ॥४३॥ बाळपणींच्या दुःखशोका । संख्यत्वें न ये लेखा । तेंही सावधान ऐका । निजजनका स्वयें भक्षी ॥४४॥ ज्या ठायांचें घेऊं नये नांव । जो गौरव जन्माचा ॥४५॥ लाळ थुंका विष्ठा मूत्र । त्यांमाजी सदा सदा पचत[६] । तोचि श्लेष्म भक्षित । बाळपणीं येथे सुख कोण ॥४६॥ उदरव्यथा[७] करी रुदन । माता मुखीं घाली स्तन । निजव्यथा न सांगवे पूर्ण । सुख कोण बालकत्वीं ॥४७॥ दांत दोन्हीं दाढा डोळे । निघती सात सात महिन्यांकाळें[८] । तान्हेपर्णी दुःखउमाळे । बालपणीं फळे सुख कोण ॥४८॥ बाळपणीं दुःख असोस[९] । तेथे नाहीं सुखाचा लेश । तैसेंचि तारुण्यही देख । दुःखदायक पुरुषासी ॥४९॥

तारुण्यात अहंमन्यता : तारुण्याचा अति आघात । निःशेष बुडवितो निजस्वार्थ । कांही नाठवे परमार्थ । अति उन्मत्त विषयार्थी ॥५०॥ शिणोनि विषय करितां पूर्ण । नित्य नवी वाढे वणवण । इंधनीं खवळे हुताशन[१०] । तेवीं विषय दारुण दुर्भरत्वें[११] ॥५१॥ नित्य विषय सेविती । परी कदाकाळी नव्हे तृप्ती । आयुष्य गेले हातोहातीं । हे तो तारुण्याप्रति लक्षेना ॥५२॥ वाढवितां विषयसोस । नित्य आयुष्याचा होय नाश । परमार्थ पडे ओस । नाहीं सुखलेश तारुण्यामाजी ॥५३॥ आयुष्याचा नित्य घात । निःशेष नासे परमार्थ । तो हा विषयांचा संघात[१२] । तारुण्यांत मुसमुसी ॥५४॥ तारुण्याच्या पोटीं । अनेक दुःखांचिया कोटी । लावी योषिता[१३] पाठी । धनधान्यदृष्टीं लोलुपत्वें[१४] ॥५५॥ तारुण्याचिया वाटा । अभिमानाचा चढे ताठा । अकार्मचा फुटे फांटा । गर्वाचा मोठा फुगारा ॥५६॥ मी एक चातुर्यसंपन्न । मी एक स्वयंपाकी सुब्राह्मण । मी एक समर्थ सधन । पवित्र पूर्ण मी एक ॥५७॥ जग अवघें अपवित्र । मीच एक श्रेष्ठ पवित्र । हा तारुण्यामाजी विचित्र । घातकसूत्र अभिमानें ॥५८॥

स्त्रीसंगाचा प्रभाव : स्त्री तरी अस्थिमासांचा कोथळा[१५] स्त्री केवळ विष्ठेचा गोळा[१६] । स्त्री वसतिस्थान विटाळा । नरकसोहळा विषयसंगे ॥५९॥ ऐसिया स्त्रीसंगापासीं । तारुण्य पुरुषा करी दासी । अखंड सेवी तियेसी । त्याची दशा ऐसी अवधारा ॥६०॥ तारुण्यमाकड

शब्दार्थ - १. भिऊ नको, २. म्हणणारा, ३. प्रतिबंध, ४. गर्भाचा गोंधळ, ५. मरणाची भीती, कढत शिजत, ६. पोट दुखण्याने, ७. महिन्यांच्या शेवटी, ८. हावरेपणा, ९. अग्नी, १०. तृप्त करण्यास कठिण असल्यामुळे, ११. समुदाय, १२. ऐक्य, समुदाय, १३. स्त्री, १४. लोभाने, १५. हाडे व मांस यांची पिशवी. १६. समूह.

स्त्रियेपुढें। ती नाचवी तैसें उडे। ती पाडी तेथें पडे। नाचवी रोकडे निजछंदें ॥६१॥ तारुण्यरासभ[1] स्त्रियेपासीं। तिचा घरोबा वाहे शिरसीं। तारुण्य श्वान स्त्रीआज्ञेसी। लाविल्या वसवसी सुहृदांते ॥६२॥ तारुण्यमांजर स्त्रीगृहासी। मियो मियों करी पायांपासीं। चाटावया स्त्रीअधरामृतासी। अहिर्निशीं टोकत ॥६३॥ तारुण्यउंदीर स्त्रियेच्या घरीं। अष्टौ प्रहर छिद्र कोरी। देखतां लपे छिद्राभीतरी। तारुण्यावरी सुख काय ॥६४॥ तारुण्य लोलुप विषयापासीं। तारुण्य स्त्रीकामाची दासी। तारुण्य गर्वें मुसमुसी। तारुण्यासीं सुख काय ॥६५॥

वृद्धावस्था-व्याधिजर्जरता : तारुण्याची ऐसी गती। सुख कैचें होईल वार्धक्याप्रती[2]। त्या वार्धक्याची[2] निजस्थिती। ऐका निश्चिती सांगेन ॥६६॥ वार्धक्यीं नाथिल्या[3] व्याधी। वार्धक्यीं नाथिल्या आधी। वार्धक्यीं भ्रंशे बुद्धी। सुख त्रिशुद्धी तेथे कैंचें ॥६७॥ जरेचें[4] भय बहुवस। जरा नाशी शरीराभास। धाकें पालटती केश। सुखाचा लेश तेथें नाहीं ॥६८॥ वार्धक्य ते केवळ पाप। तेणें सर्वांगी उठे कंप। भेणें बोची हाले लपलप। शब्दाचा पोंचट प्रलाप[5] होय ॥६९॥ वार्धक्य देखोनि येतां। समूळ पळणी होय दाता। क्षीण होय इंद्रियसत्ता। सुखाची वार्ता तेथें नाहीं ॥७०॥ तारुण्यापासीं समस्त वित्त। जे कांता भोगी समस्त। तेचि विमुख होय वार्धक्यांत। हा वार्धक्याचा येथें बडिवार[6] ॥७१॥ वार्धक्यीं जिरेना अन्न। तरी खावयाची तृष्णा गहन। वृद्धांचे सदा सचिंत मन। सुख कोण वार्धक्यीं ॥७२॥ वार्धक्यीं शोकसमूहु। वार्धक्यीं ममता बहु। वृद्धातें बाळे म्हणती बाऊ। हा सुखगौरवू वार्धक्यीं ॥७३॥ बाईल नायके बोला। बाळें दाविती वांकुल्या। जो तो चेष्टवी मुला। जरठा[7] खवळविती विनोदें ॥७४॥ जरचे बळ बहुवस। वळ बैसेना माणूस। खोकला लागे बहुबस। भोंवतें बळसचिडाणी[8] ॥७५॥ जराजर्जरकल्लोळें। शरीराची शक्ति पळे। डोळे होती सरकाळे[9]। तोंडींहूनि लाळ गळे उरावरी ॥७६॥ मरणें व्यापिलें शरीर। तरी म्हणे माझी स्त्री माझें घर। माझे नातु माझे पुत्र। ही ममता फार सोडीना ॥७७॥ जरी घातला अर्धजळीं। तरी स्त्री पुत्र न्याहाळी। नातवंडे आणा रे मजजवळी। ममतेमेळीं देहांत ॥७८॥

विषयांच्या लोभाने नरदेह फुकट जातो : नरदेहींचा आयुष्यसारा। विषयलोभे केला मातेरा। परलोका पडला चिरा। नरकद्वारा करी गमन ॥७९॥ देहबुद्धीच्या कल्लोळीं[10]। मोहममतेच्या महाज्वाळीं। परमार्थाची जाली होळी। वृथा रवंदळी[11] नरदेहा ॥८०॥ देहीं व्यर्थ विषयसुख। देहें नाशिलें स्वर्गसुख। देहें वंचिलें मोक्षसुख[12]। केवळ दुःख देहसंगे ॥८१॥ शतवर्षे विषयासक्ती। एकाही इंद्रियां नव्हे तृप्ती। उत्तमा आयुष्या जाली माती। केवळ अधःपाती देहसंग ॥८२॥ देहसंगामाजी सुख। मानिती ते केवळ मूर्ख। देहसंग तें केवळ दुःख। गर्भनरक भोगवी ॥८३॥ श्रीराम म्हणे गुरुनाथा। अंगीं देहअंहता नांदतां। सुख कोण राज्यभोगार्था। विषयस्वार्थां सुख काय ॥८४॥

अहंकारमहिमा : अहंकाराऐसा वैरी। बैसला असतां उरावरी। सुख नाहीं हो संसारीं। निजनिर्धारीं निश्चयो ॥८५॥ अहंकार जडला जीवीं। तो साधनीं रिघोनि गोवी। अहंकार हा जीवभावीं। उघड नागवी जगातें ॥८६॥ मुख्य बाधक अहंता। तिसी साह्य जालीया ममता। अहंममता न जिणतां[13]। सुख सर्वथा असेना ॥८७॥ जालिया शुद्ध शास्त्रश्रवणें। उभय भोग ऐसा देखणें। जे भक्षोनियां वमनें। आतांचि का सुणें[14] वमोनि[15] गेलें ॥८८॥ वमनातें स्वयें भक्षी श्वान। तैसा इहभोग संपूर्ण। तो भोग वांछिती सज्ञान। तें ज्ञातेपण लौकिकी सटवलें[16] ॥८९॥

---

**शब्दार्थ** - १. तारुण्यरूपी गाढव, २. म्हातारपणी, ३. नसत्या. ४. वृद्धावस्थेचे, ५. उच्चार, ६. थोरपणा, ७. म्हाताऱ्याला, ८. ओंगळपणा, किळस, ९. निस्तेज, तबल, १०. लाटांत, ११. तुडवातुडवी, १२. नष्ट केले, १३. जिंकिता, १४. कुत्रे, १५. ओकून, १६. व्यर्थ गेले.

अहंकारनिंदा : अहंकार तो मुख्य वैरी । विषयलोभ चढला शिरीं । तेणें संसार दुस्तर भारी । निजनिर्धारीं ऋषिवर्या ॥९०॥ यालागीं न निरसे अभिमान । तंव मी न करीं रसपान । न करीं मिष्टान्नभोजन । न करीं परिधान दिव्यंबरें ॥९१॥ मी न करी क्रियाकर्माचार । कर्म केवळ शरीराधार । तेथें संचरे अहंकार । मी पवित्र अति श्रोत्री ॥९२॥

या संकटमुक्तीसाठी उपायाची प्रार्थना : जेणें पाविजे ब्रह्मप्राप्ती । ऐसी असेल जरी युक्ती । ते सांगावी मजप्रती । कृपामूर्ति ऋषिवरा ॥९३॥ मज नसेल अधिकार । तरी तुम्ही संत सर्वाधार[1] । सत्संगती दीनोद्धारें । हे ब्रीद साचार संतांचे ॥९४॥ चंदनाचे संगतीं । खैर धामोडे चंदन होती । तेंवीं संतांचे संगतीं । ब्रह्मप्राप्ती दीनासी ॥९५॥ ऐसें बोलोनि रघुनाथ । उगाच राहिला तटस्थ[2] । ऋषि राजा आणि लोक समस्त । जाले विस्मित ते काळीं ॥९६॥

सर्वांना वरील प्रश्नाने संतोष : श्रीरामवैराग्यसमेळीं । ऋषीश्वर दाटले भूतळीं । सिद्ध दाटले नभोमंडळीं[3] । मुमुक्षु ते काळीं चातक जाले ॥९७॥ वैराग्यें बोलिला रघुनाथ । तेणें जाले सुर नर तटस्थ ॥ सिद्ध चाकाटले[4] समस्त । जाले विस्मित सुरवर ॥९८॥ ऐकोनि श्रीरामाची गोष्टी । सुख जालें सिद्धांच्या पोटीं । तिहीं केली पुष्पवृष्टी । श्रीराममुकुटीं स्वानंदें ॥९९॥ नभीं सिद्धांचा जयजयकार । भूतळीं गर्जती ऋषीश्वर । जयजयकार करिती नर । सुखें निर्भर[5] सभा जाली ॥१००॥ सिद्ध बोलती स्वानंदता । ऐसी न ऐकों हे वैराग्यवार्ता । आम्हीं त्रैलोक्यीं हिंडतां । श्रीरामें तत्वता सुखी केलें ॥१॥ एवं सिद्ध स्वानंदेसीं । आले दशरथाचे सभेसी । ऋषिरामसंवादेंसीं । त्या गृह्यासी परिसावया ॥२॥ वसिष्ठ विश्वामित्र दोन्ही । आणि सिद्ध साधक मुनी । रायें पूजिले संतोषोनी । हर्षें मनीं निर्भर ॥३॥ स्वयें येऊनि रघुनाथ । सिद्ध पूजिले श्रद्धायुक्त । ऋषि पूजिले समस्त । पूजिला दशरथ परमार्थबुद्धी ॥४॥ सुर नर ऋषि सिद्धगण । सभा बैसली सावधान । एका विनवी जनार्दन । श्रोते ब्रह्मज्ञान अवधारा ॥१०५॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीरामवैराग्यनिरूपणं नाम नवमोऽध्यायः ॥९॥ ओंव्या ॥१०५॥

## अध्याय दहावा

### राजा जनक व शुकाचार्य यांचा संवाद

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

विश्वामित्र उवाच-न राघव तवास्त्यन्यज्ज्ञेयवतां वर ॥
स्वयैव सूक्ष्मया बुद्ध्या सर्वं विज्ञातवानसि ॥१॥

विश्वामित्र म्हणे रघुनाथा । तूं सूक्ष्मबुद्धि अति तीक्ष्णता । ज्ञान ज्ञेय परमार्थी । स्वभावता परिपूर्ण ॥१॥ ज्ञात्यांमाजी ज्ञानवरिष्ठ । त्यांचा अनुभव जो चोखट[6] । तो तुजमाजी दिसे प्रकट । वैराग्य उद्भट ज्ञानगर्भा ॥२॥ वैराग्य जें ज्ञानसगर्भ । तोचि ज्ञानाचा समारंभ । वैराग्येंवीण ज्ञान दुर्लभ । तें तुज सुलभ स्वभावता ॥३॥

भगवद्व्यासपुत्रस्य शुकस्येव मतिस्तव । विश्रांतिमात्रमेवैतज्ज्ञाता ज्ञेयमपेक्षते ॥२॥

जैसा शुक व्याससुत । जन्मापासोनि स्वभावमुक्त । तैसाचि तूं रघुनाथ । प्राप्त परमार्थ स्वभावें ॥४॥ त्या शुकाचा ज्ञानार्थ । विकल्पें पावला घात । तोचि गुरुवाक्यें निश्चित । निजपरमार्थ पावला ॥५॥

श्रीराम उवाच-भगवन्व्यासपुत्रस्य शुकस्य भगवन्कथम् । ज्ञेयेऽप्यादौ न विश्रांतं विश्रांतं च भिया पुनः ॥३॥

शब्दार्थ - १. सर्वाला आधार, २. निवांत, स्तब्ध, ३. आकाशात, ४. चकित झाले, विस्मय पावले, ५. परिपूर्ण, ६. श्रेष्ठ.

राम म्हणे ऋषिवर्या । ऐकिलें वाक्य परमाश्चर्या । ज्ञान पावोनि शुकवर्या । विकल्प धरावया काय कारण ॥६॥ त्या शुकाची समूळ कथा । मज सांगावी स्वामिनाथा । ज्ञान पावोनि विकल्पता । शुकाच्या चित्ता बाणली[१] कैसी ॥७॥ तोचि विकल्प पुढती । कैसेनि मावळला चित्तीं । कैसेनि पावला विश्रांती । हें मजप्रति सांगावें ॥८॥

विश्वामित्र उवाच-

आत्मोदंतसमं राम कथ्यमानमिदं मया ॥ श्रृणु व्यासात्मजोदंतं जन्मनामंतकारणम् ॥४॥

विश्वामित्र म्हणे श्रीरामा । व्यापुत्राची ज्ञान[२] गरिमा । अगाध विचाराची महिमा । नाहीं सीमा अनुपम्य ॥९॥ त्या श्रीशुकाचा निजविचार । त्याही विचाराचें निजसार । तुज मी सांगेन साचार । सविस्तर अवधारीं ॥१०॥

शुकाख्यान : जन्मस्वभावें शुक मुक्त । विवेकवैराग्यपूर्ण भरित । तो श्रीव्यासास न पुसत । स्वेच्छा वनांत निघता झाला ॥११॥

यं प्रव्रजंतमनुपेतमपेतकृत्यं द्वैपायनो विरहकातर आजुहाव ॥
पुत्रेति तन्मतया तरवोऽभिनेदुस्तं सर्वभूतहृदयं मुनिमानतोऽस्मि ॥५॥

शुके न करितां पाणिग्रहण[३] । न घेता संन्यास संपूर्ण । व्यासासी न पुसतांचि जाण । निघाला आपण सर्वस्वत्यागे ॥१२॥ त्या शुकाची पूर्ण स्थिती । देखोनि व्यासासी अति प्रीती । तेणें सुखें शुकाप्रती । पुत्रासक्ती धांविन्नला ॥१३॥ पुत्रप्राप्तीचें व्यासासी सुख । त्याचें पहावया मुख । व्यासासी अत्यंत हरिख[४] । ये गा आवश्यक शुकासी म्हणे ॥१४॥ मी शुक नव्हें एकदेशी । तो मी सर्वभूतनिवासी[५] । हे प्रचीती यावया व्यासासी । वृक्ष त्यासी ओ देती ॥१५॥ व्यास बोभाये[६] पुत्रवचनीं । वृक्ष वदती प्रतिवचनीं । तेणें व्यास सुखावोनी । पुत्रागमनीं उद्यम ॥१६॥ शुका म्हणतांचि जाण । वृक्ष ओ देती आपण । तेणें शुकाचें पूर्णपण । व्यासासी पूर्ण कळों आलें ॥१७॥ ऐसें असतां पूर्णपण । त्यामाजी विकल्पाचें विंदान[७] । मुख्यत्वें स्त्रीवाक्याचें श्रवण । तणें विकल्प पूर्ण श्रीशुकासी ॥१८॥ शुकें स्त्रियां नाहीं देखिल्या दृष्टी । नाहीं स्त्रियांची घेतली भेटी । त्यांची अन्योक्ति ऐकतां गोष्टी । विकल्प पोटीं शुकाच्या ॥१९॥ प्रमदा परमार्थ पुसों आली । हे गुरुत्वा भुली पडली । प्रमदा केवळ प्रमादीं घाली । तिचे बोलीं विकल्प ॥२०॥ प्रमदांप्रति परमार्थ । हा गुरत्वा अति अनर्थ । त्या अनर्थाचा निजघात । श्रीशुकांत विकल्पू ॥२१॥ परमार्थ गुरुत्वाचा अति अनर्थ । त्या अनर्था अति घात । तो श्रीशुकाआंत । असे नांदत सावकाश ॥२२॥

जलाशयावर स्नानासाठी शुक आणि व्यास गेले असता अप्सरांची झालेली वेगवेगळी मनस्थिती :

सिद्धसरोवराप्रती । नग्न अप्सरा स्नान करिती । शुक जातां आत्मस्थिती[८] । त्या स्वइच्छा खेळती निर्लज्ज ॥२३॥ मागूनि व्यास येतां देखती । अप्सरा अति सलज्ज होती । एकी वस्त्र आड करिती । एकी बैसती उदकांत ॥२४॥ शुक तरुण नग्नगती । जातां अप्सरा न लाजती । मी वृद्ध यांचे आज्याचे स्थिती । मज का लाजती देवांगना ॥२५॥ शुकाचे ठायीं त्यांची आसक्ती । त्यासी निर्लज्ज अवयव दाविती । मी वृद्ध नावडें चित्तीं । यालागीं लाजती स्वर्गांगना ॥२६॥ हा अप्सरांचा भावों । हे त्यांचे पासीं पुसों जावों । हा व्यासाचा अभिप्रावो । तो प्रश्नपर्याव पूसत ॥२७॥ श्रीशुकासी कां नाहीं लाजल्याती । मज लाजल्याती कोण्या अर्थी । हे परम प्रमाण निश्चितार्थी । माझी प्रश्नोक्ती सांगावी ॥२८॥

---

शब्दार्थ - १. प्रतीतीस आली, ठसावली, २. ज्ञानाची थोरवी, ३. लग्न, गृहस्थाश्रम, ४. हर्ष, आनंद, ५. सर्व भूतांचे ठिकाणी वास करणारा, ६. हाका मारी, ७. प्राविण्य, ८. ब्रह्मस्थितीने, ब्रह्मभावनेने.

**अप्सरांचे व्यासांना उत्तर :** ऐकोनि व्यासाची प्रश्नोक्ती । हांसोनि अप्सरा बोलती । जैसी ज्याची अंतरवृत्ती । तैसें त्याप्रती वर्तों आम्ही ।।२९।। मुने तुझें ज्ञान भेदानुवृत्ती[1] । शुकासी सदा अभेदगती । अभेदी लाजेची अप्राप्ती । भेदा प्राप्ती सलज्ज ।।३०।। शुक अभेद कैसा कळला । माझा भेद कोठे देखिला । जेव्हां लज्जेचा प्रश्न केला । तेणेंचि दाविला भेद तुझा ।।३१।। तुज स्त्रीपुरुषभेदव्यक्ती । यालागीं तू केली प्रश्नोक्ती । शुकाची सूक्ष्म अभेदगती । स्त्रीपुरुषव्यक्ति देखेना ।।३२।।

**तें उत्तर ऐकून ''मी ज्ञाता'' असा शुकास अभिमानस्पर्श :** ऐसें ऐकतां स्त्रियांचे वचन । मी ज्ञाता व्यास अज्ञान । ऐसा शुकासी ज्ञानाभिमान । हृदयीं संपूर्ण प्रविष्टला ।।३३।। बाप स्त्रीवाक्याची ख्याती ब्रह्मज्ञानाची केली शांती । विकल्प वाढविला चित्तीं । उठली स्फूर्ति[2] मी ज्ञाता ।।३४।। मी ज्ञाता तो अज्ञान । ऐसें जेथें स्फुरे स्फुरण । तेथोनि पळे ब्रह्मज्ञान । ज्ञानाभिमान उरे देहीं ।।३५।। हिंग पडतांचि रांजणीं । गोडवणी होय हिंगवणी । तेवीं विकल्प प्रवेशतां ज्ञानीं । ज्ञानाभिमानीं उडे ज्ञान ।।३६।। दुग्धीं कांजीचा थेंबु पडे । तेणें दुग्धाचे होती कवडे । तेविं ज्ञानीं विकल्प वाढे । तैं ज्ञान उडे ज्ञानाभिमानें ।।३७।। सावध कनकबीज[3] खाय । तो क्षणार्धें भ्रमित होय । तेंवि विकल्पाच्यानि अन्वयें । ज्ञात्या होय ज्ञानाभिमानु ।।३८।। व्यास अज्ञान भेददृष्टी । मी सज्ञान ऐक्यपुष्टी । ऐसा विकल्प शुकाचे पोटीं । स्त्रीवाक्यासाठीं दृढ झाला ।।३९।। दीप मालवल्यापाठीं । काजळीची पोहणी[4] उठी । तेंवि ज्ञान जातांचि शेवटीं । अति गर्व उठी ज्ञानाभिमानें ।।४०।।

**गुरुवाक्याशिवाय ज्ञान व्यर्थ होय :** स्वयंबुद्धीचें विवेकज्ञान । विकल्पमात्रें होय क्षीण । जो ज्ञानानुभव गुरूचे ठायीं । तें ज्ञान गुरुवाक्यें अति निपुण । तें ज्ञान पूर्ण निश्चयें ।।४१।। जो ज्ञानानुभव गुरूचे ठायीं । तें ज्ञान अति अक्षयी । विकल्प न रिघे ते ठायी । अति अनपायीं[5] गुरुज्ञान ।।४२।। गुरुवाक्येंवीण जें ज्ञान । तें क्षयरोगी जन्मलें जाण । विकल्पमात्रें सांडी प्राण । अति क्षीण अपायी ।।४३।। आचार्यवान् पुरुषो वेद । हें वेदवाक्य प्रसिद्ध । गुरुवाक्यें ज्ञानविशुद्ध । प्रजा प्रबुद्ध[6] गुरुवाक्यें ।।४४।। गुरुवाक्येंवीण सर्वथा । ज्ञान नासे विकल्पता । हेचि शुकाची व्यवस्था । व्यासासी सर्वथा कळों आली ।।४५।। शुकाचें ब्रह्मज्ञान । विकल्प वाक्यें जाले क्षीण । शुक जाहला ज्ञानहीन । तें व्यासासी चिन्ह कळो[7] सरले[7] ।।४६।। व्यास जाणे भेदज्ञान । तोचि भेदि अभेद सर्वज्ञ । हें शुकासी न कळे चिन्ह । तेणें विकल्प पूर्ण दृढ धरिला ।।४७।। व्यास शुकालागीं अति आसक्त । क्षणक्षणां म्हणे परत । तोचि जालिया विकल्पयुक्त । त्यावरी परत न म्हणे व्यास ।।४८।। व्यास अंतर्यामी आपण । जाणोनि शुकाचें ज्ञान ज्ञानें क्षीण । जेणें पावे ज्ञान संपूर्ण । तो कृपेनें आपण सत्संग सांगे ।।४९।।

जनको नाम भूपालो विद्यते वसुधातले ।।६।।

**शुकाला जनकाकडे जाण्यास व्यास सांगतात :** व्यास म्हणे श्रीशुकासी । तूं तंव स्वइंच्छा जातोसी । अवश्य जाई जनकापासीं । निश्चय पावसी त्याचेनी ।।५०।। जनक राजा पृथिवीचे ठायीं । राज्य करोनि तो विदेही । ज्ञान[8] विज्ञान त्यासी सर्वही । परिपूर्ण पाहीं पूर्णत्वें ।।५१।। जो संदेह निजमानसीं । त्याचेनि निःसंदेह होसी । समाधान जनकापासीं । परमार्थासी परमार्थ ।।५२।। आपण ज्ञान सांगावें त्यासी । व्यास अज्ञान हें शुकाचे मानसीं । यालागीं धाडी जनकापासीं । श्रीशुकासी निश्चयार्थ ।।५३।। श्रीशुकाची मनोवृत्ती । म्हणे कळली व्यासाची ज्ञानस्थिती । आतां जनकाची ज्ञानोक्ती । तेंहीं निश्चिती पाहूं पां ।।५४।। ऐसें विचारोनि मनीं । मेरुगिरी उतरोनी । जनकगिरी ठाकोनी । तत्क्षणीं तो आला ।।५५।। नग्न नगरात जातां । होईल लोकोपहासकता[9] ।

---

शब्दार्थ - १. भेदवृत्तीने पूर्ण असलेले, २. स्फुरण, ३. धोतऱ्याचे बीज. ४. दुर्गंधी, घाण, ५. दुःख न देणारे, ६. शहाणी. ७. कळून आले. समजले. ८. अनुभवज्ञान. ९. लोकांमध्ये उपहास.

पथीं चीरांची तत्वतां । लोकलज्जार्थ कौपीन केली ।।५६।।

रिक्तहस्तेन नोपेयाद्राजनं देवतां गुरुम् ।।७।।

जनकप्रासादात शुकाचा प्रवेश : केवळ रिक्तहातेंसी । भेटों नये रायासी । तैसेचि देवालयासी । रिते हस्तेंसी न जावें ।।५७।। सद्‌गुरु जो कां कृपामूर्ती । त्यासीही भेटूं नये रिते हातीं । हेंचि वृद्ध वृद्ध शिकविती । धर्मशास्त्रीं नीति निश्चयें हेची ।।५८।। जनक गुरुत्वें जगद्‌गुरू । तोचि नरेंद्रां नरेंद्रु । त्यांसी रिक्त हस्तें नमस्कारू । करी तो नर स्वधर्ममंद ।।५९।। जनक निर्लोभद्रव्यदृष्टी । ऐसा निश्चय धरोनि पोटीं । हातीं घेतली राखोटी[1] । जनकभेटीलागोनी ।।६०।। चीर कटीं सूत्र कंठी । कौपीन हातीं राखोटी[2] । राजद्वारा आला उठाउठी । द्वारपाळें देखिला ।।६१।। ब्रह्मसूत्रेंवीण नव्हे ब्राह्मण । संन्यासी नव्हे दंडेंवीण । दिगंबर नव्हे हा संपूर्ण । अति विलक्षण वेषधारी ।।६२।।

शुकाला 'संगत्यागा'चा जनकाचा संदेश : यालागीं श्रीशुकासी । द्वारपाळ निवारी त्यासी । तो म्हणे सांग रायापायीं । मी शुद्ध भेटीसी आलों से ।।६३।। त्या श्रीशुकाचें मनोगत । मी आलों असें ब्रह्मसुत । राजा सामोरा येईल येथ । सन्मानयुक्त नेईल ।।६४।। ऐशा ज्ञानाभिमानें थोर । श्रीशुकामाझारी बांधले घर । तें कळलें रायासी अंतर । शुकविकार हृदयस्थ ।।६५।। शुकाची स्वयें घेतां भेटी । तो विकल्प धरील पोटीं । व्यास बोलिला जे गोष्टीसाठीं । त्या विकल्पपुष्टी शुक नांदे ।।६६।। आपण न घेत भेटी । जेणें विरे चिकल्पाची गांठी । त्या त्यागाची सांगू गोष्टी । जेणें निजात्मदृष्टी[3] शुक पावे ।।६७।। भेटी न घेतां आपण । शुक पावे समाधान । ऐसें साधोनि विंदान । द्वारपाळासी वचन राव बोले ।।६८।। द्वारी उभा महानुभाव[4] । संग त्यक्वा सुखी भव । हा त्यासी सांगावा अभिप्राय । तो निजानुभव[5] पाहील ।।६९।।

'संगत्यागे सुखप्राप्ती' असा जनकाचा दुसरा संदेश : द्वारपाळ म्हणे श्रीशुकासी । संगत्यागें सुखी होसी । हें रायें सांगितलें तुम्हांसी । येरू निजमानसीं क्षोभला ।।७०।। मी काय राजभारू वाहे । मज काय स्त्रीसंग आहे । मी निःसंग निजनिर्वाहें । सांग जाय पाहें रायासी ।।७१।। हातींची टाकिली राखोटी । तोडोनि टाकिली लंगोटी । निःसंग मी एक सृष्टीं । मज पहावया दृष्टी येऊं दे राजा ।।७२।।

जनकाचे देहममत्वाविषयी प्रश्न व शुकाची तटस्थावस्था : द्वारपाळें रायाप्रती । सांगितल्या शुकोक्ती । राजा तेंचि सांगे तयाप्रती पुढती[6] । संगत्यागस्थितीं सुखी होय ।।७३।। संगत्यागें सुखप्राप्ती । द्वारपाळ सांगे राजोक्ती । आतां कोण संग मजप्रती । ते येऊनि नृपति पाहो सुखें ।।७४।। संगत्याग पुढतपुढती । राजा सांगे कोण्या अर्थीं । कोण संग आहे मजप्रती । तें पाहूं निश्चितीं आदरिलें ।।७५।। मी शुक तों येथें कोण । माझ्या शुकत्वा काय कारण । वस्तु नामरूपातीत[7] पूर्ण । शुकीं शुकपण देहत्वें ।।७६।। देहाचे माथां शुकपण । तो देह येथें किलक्षण । देह पांचभौतिक[8] पूर्ण । माजी मी कोण तें शोधूं[9] पां ।।७७।। देह पंचभूतआभास । त्या पंचभूतांचा विलास । विवंचूं पा सावकाश । स्वस्वरूप साधावया ।।७८।। पृथ्वी नव्हें मी जडत्वें । जळ नव्हें मी अधोगमनत्वें । तेज नव्हें मी दाहकत्वें । मी चंचळत्वें वायु नव्हें ।।७९।। रितें दिसे जेथें जेथें । तें नभ नव्हे मी शुकत्वें । मी नव्हें पंचभूतें । त्याहूनि परतें तें मी स्वयें ।।८०।। अहं नव्हें मी देहममत्वें । सोहं नव्हें मी मायिकत्वें । अहंसोहंहूनि

शब्दार्थ - १. वल्कलांची वस्त्रांची, चिंध्यांची, २. राखुंडी, ३. आत्मज्ञान, ४. महाप्रतापी, ५. आत्मानुभव, ६. पुन्हा, ७. नामरूपशून्य, ८. पाच भूतांपासून झालेला, ९. कोणत्या लक्षणाचा ते शोधून पाहू.

परतें । तें मी निश्चितें निजरूप ॥८१॥ ऐसी विवंचितां उपपत्ती[1] । स्वरूपीं पावली वृत्ती । तेणे तटस्थ जाली स्थिती । इंद्रियवृत्ति निचेष्टित ॥८२॥ ऐसा निचेष्टित सात रात्री । उभा होता राजद्वारीं । दंश मशक मत्कुणांमाझारी । सत्पत्रात्री अचंचळ[2] ॥८३॥ शुकासी निर्विकल्प-समाधी । द्वारपाळ रायासी सांगती आधीं । शुक पूर्ण जाला त्रिशुद्धी । अहंबुद्धी हारपली ॥८४॥

**शुकाची निश्चल स्थिती : शुकाला जनानखान्यांत नेणे** ऐसे सांगता द्वारपाळ । विदेही हरुषला प्रबळ । सामोरा जावोनी तत्काळ । अंतरगृहासी आणी ॥८५॥ रायें उचलोनियां त्यासी । ठेविला पैं राणिवसीं[3] । श्रीशुकाची दशा कैसी । पुसे राणियांसी स्वयें राव ॥८६॥ नाना भोगविलासीं । शुकासी निर्द्वंद्व राणिवसीं । विदेहत्व बाणलें त्यासी । ऐसा रायासी निश्चयो जाला ॥८७॥ ब्रह्मत्व बाणलें योगिराजा । जाणोनि उल्लास भूभुजा । सिंहासनीं बैसवोनि वोजा[4] । श्रीशुकाची पूजा ब्रह्मत्वें केली ॥८८॥ स्वमुखें सांगे श्रीशुकासी । मी जनक आलोंसे भेटीसी । वचनें शुक जाला उल्लासी । सर्वभावेंसी नृप नमियेला ॥८९॥ नमूनियां श्रीरायाचे चरण । शुक तटस्थ झाला संपूर्ण । त्याचें देखोनिया लक्षण । तें ज्ञान अपूर्ण नृप मानी ॥९०॥ सर्वेंद्रियीं निरत । ज्ञान नाहीं नित्यमुक्त । तें ज्ञान साशंकित । पूर्णत्व तेथें असेना ॥९१॥ आंब्यां पाड लागल्या झाडीं । सेजेनें[5] न मुरता न ये गोडी । नि:शंक ज्ञान न होतां जोडी । तटस्थ गाढी[6] अपक्कता ॥९२॥ दधि मंथूनि काढिजे लोणी । तें ठेविता धरी खवट घाणी । तेंचि अग्निसंगे तावूनी । सुगंधपणीं सुस्थिर ॥९३॥ तेंवी तटस्थ अति संपूर्ण । तेचि मुख्यत्वें अपक्कता जाण । सर्वेंद्रियीं चित्तसमाधान । तें ज्ञानविज्ञान अति शुद्ध ॥९४॥ शुकाची तटस्थता मोडे । त्यासी शुद्ध ज्ञान जोडे । ऐसें विचारोनि धडफुडें[7] । निजनिवाडें[8] नृप बोले ॥९५॥ राजा म्हणे तटस्थ स्थिती । शुका कोठे आहे तुझी वृत्ती । येरू म्हणे आत्मप्रतीती । वृत्ति निश्चितीं सुखरूप ॥९६॥ ऐसी आत्मस्थिती आहे । त्याची स्थिति डोळां पाहे । तेव्हां दृश्य[9] द्रष्टा[10] चिन्मात्र[11] होय । हा अनुभव पाहें आत्मत्वाचा ॥९७॥ शुक जंव आत्मस्थिती पाहे । विस्मयें चाकाटला[12] ठाये । निजदेह नाहीं होये । वश्यत्वें राहे ब्रह्मपूर्णत्वें ॥९८॥ जें जे देखों जाय ठिठीं । तें तें आत्मत्वेंचि उठी । बाप गुरुवाक्याची कसवटी । दृश्याचिये पोटीं परब्रह्म नांदे ॥९९॥ स्त्रीपुरुषाचिये व्यक्ती । पूर्णब्रह्मत्वें प्रचीती । पशु पक्षी नाना जाती । आत्मस्थिती जग नांदे ॥१००॥

**शुकाला आलेली सद्गुरूमहिम्याची प्रचीती :** जें जें पाहे तें तें आत्मस्थिती । तंव तंव सर्वेंद्रिया ब्रह्मप्राप्ती । गुरुवाक्याची परम ख्याती । सभाग्य पावती स्वानंदे ॥१॥ अगाध सद्गुरुगरिमा[13] । ब्रह्मत्व आलें इंद्रियकर्मा । सहज भेटी परब्रह्मा । देहधर्म चिदत्वें ॥२॥ निद्रेचें निजशेजार । तळी घरा ना वरी अंबर । पहुडणें अति अरुवार[14] । चिदचिन्मात्रस्वभावें ॥३॥ विसरोनि शेष निमाला । आठवाचा ठावो पुसिला । सहज सुखें सुखाळु जाला । दुष्काळ पडिला देहभावा ॥४॥ जागृती आली ब्रह्मपूर्ण । स्वप्न जालें चैतन्यघन । सुषुप्ती जाली सुखसंपन्न । हा प्रताप पूर्ण गुरु आज्ञेचा ॥५॥ गुरु आज्ञेचा चमत्कार । श्रवणीं पडतांचि अक्षर । सुखरूप जाला संसार । चराचर ब्रह्ममय ॥६॥ गुरुवाक्याचा गौरवो । शुकासी जाला सहजानुभवो । तेणें अति आल्हादें पहा हो । साष्टांगी राव सद्भावें नमिला ॥७॥ रायें दिधलें आलिंगन । दोघांचे गेलें दोनीपण । मुसावलें[15] चैतन्यघन । पूर्णत्वें पूर्ण परिपूर्ण जाला ॥८॥ पूर्णत्वें पावोनि समाधान । सहज अंगी सुटले आलिंगन । तरी न दिसे दोनीपण । अखंडत्वें पूर्ण आत्मत्वा ॥९॥ शुक

---

शब्दार्थ - १. उद्देश, कारण, २. स्थिर, ३. राण्या रहाण्याच्या जागेत, जनानखान्यात, ४. आदराने, सन्मानाने, ५. आंब्याच्या आढीत, ६. मोठी, ७. नीट, ८. आत्मनिश्चयाने, ९. जे पहावयाचे ते, १०. पहाणारा, ११. पूर्ण ज्ञान, १२. चकित झाला, १३. सद्गुरूचा महिमा, १४. नरम, १५. एकत्र झाले, ओतले.

म्हणे जनकाप्रती । नकळोनि हे सहजस्थिती । म्यां विकल्प धरिला चित्तीं । मुख्य पूज्य मूर्ति श्रीव्यास ।।११०।। व्यासासी स्त्रीपुरुषभेद भिन्न । ऐसें अप्सरांचे वचन । ऐकोनि विकल्पें भरलें मन । व्यास अज्ञान निश्चयें मानीं ।।११।। ऐसिया विकल्पाचा समूळ दाहो । तुझेनि वचनें केला पाहाहो । धन्य ज्ञानाचा अनुभवो । निःसंदेहो भवद्वाक्यें[१] ।।१२।। द्वारपाळाच्या निरोपावरी । माया अविद्या विकल्पा बोहरी[२] । तुझ्या वैभवाची थोरी । वंद्य सुरवरीं सर्वत्र ।।१३।। बाप वाक्याचे तिखट बाण । घायेंवीण छेदिला प्राण । जीव मारोनिया संपूर्ण । पूर्णत्वीं पूर्ण मज केले ।।१४।। ऐकोनि शुकाचें वचन । जनक जाला सुखसंपन्न । येथोनि शुक जाला सुखपूर्ण । संतोषोनि आपण काय बोले ।।१५।।

जनकाकडून शुकाला ज्ञानोपदेश : जनक म्हणे धन्य धन्य । जें तुज जालें समाधान । तेंचि गुह्याचें गुह्य ज्ञान । ब्रह्मसमाधान तया नांव ।।१६।। पूर्वींच तूं ज्ञाननिधी । वस्तु आकळिली निजात्मबुद्धी । गुरुवाक्य तेचि त्रिशुद्धी । निजात्मसिद्धी निश्चित ।।१७।। जे तूं पावलासी समाधी । यावरी ज्ञानसिद्धि । नाहीं नाहीं गा त्रिशुद्धी । निजात्मबुद्धी याचि नांव ।।१८।। जे तुज जाली आत्मप्राप्ती । तेचि नारायणाची ज्ञानोक्ती । तेंचि ज्ञान श्रीकृष्णनाथीं । तेचि स्थिति नारदाची ।।१९।। तेचि स्थिती याज्ञवल्क्यासी । तेचि स्थिती व्यासासी । तेचि स्थिति मजपासीं । निश्चयेसीं निश्चित ।।१२०।। स्नेहें[३] सूत्रें[४] दीप भिन्न । प्रभा एकत्वें अभिन्न । तेवीं ज्ञात्याचें विचित्र कर्मचिन्ह । परी ज्ञेय ज्ञान एकची ।।२१।। नारदासी नित्य लंगोटी । कृष्ण वैभवें संपन्न सृष्टीं । दोहींची ज्ञानकसवटी[५] । एकत्वें पुष्टी समसाम्य ।।२२।। जडभरत म्हणती जड । याज्ञवल्की ज्ञानारूढ । दोहींचें ज्ञान एकत्वें गोड । ज्ञानीं पडिपाड[६] असेना ।।२३।। देह देतां दोष कोटी । आत्मत्वें पाहतां निदोष सृष्टी । यालागीं देहीं न ठेवावी दृष्टी । दोषांची कोटी देहात्मता ।।२४।। ऐकोनि जनकाची गोष्टी । सुख जालें शुकाच्या पोटीं । संशय गेला उठाउठीं । स्वानंदपुष्टी सदादित ।।२५।। यापरी जनकें श्रीशुकासी । सांगितलें शुद्ध ज्ञानासी । तेणें विश्रांति जाली रायासी । तें सुख वाचेसी न बोलवे ।।२६।। सुख उलथलें[७] संपूर्ण । सकळ संशयां जालें दहन । वाचेसी पडिलें महामौन । भय शोक पूर्ण मावळले ।।२७।। निमाली हृदयाची आधी[८] व्याधी । इंद्रियें निवालीं सुखावबोधीं[९] । विश्रांति पावली त्रिशुद्धी । सुख सुखावबोधी संतुष्ट ।।२८।।

शुकाचे मेरुपर्वतावर गमन : शुक म्हणे रायाप्रती । मज जाली परम विश्रांती । ते विश्रांती भोगावया एकांती । मेरुगिरीप्रति शुक गेला ।।२९।। निर्विकल्प निरहंकारी । आसन घालोनि योगमुद्रीं । शुक बैसला समाधिवरी । मेरुशिखरीं स्वानंदे ।।१३०।। स्नेहेंवीण प्रकाशरूप । निर्वातांचा[१०] जैसा दीप । तैसें शुकाचें समाधिस्वरूप । निर्विकल्प या नांव ।।३१।। शुक म्हणे मी क्षणभरी । सुखें बैसलों मेरुशिखरीं । बाहेर संख्या शास्त्रांतरीं । दशसहस्रीं जाली अब्दें ।।३२।। एवं स्वरूपाचे ठायीं । मुळी उदय अस्त नाहीं । काळा तेथे अटक पाहीं । ठेविता ठायीं टिकेना ।।३३।। ऐकें श्रीरामा कृपामूर्ती । यापरी शुकाची ब्रह्मप्राप्ती । जनकें आणिली यथास्थिती । आत्मप्रतीती समाधिस्थ ।।३४।। समाधि आणि उत्थान । दोनी अवस्था बोळवून । करोनियां श्रीशुक जाण । जाला संपूर्ण पूर्णत्वें ।।३५।। एका जनार्दना शरण । शुक सुखें जाला ब्रह्मसंपन्न । पुढें श्रीरामातें पूर्णपण । वसिष्ठ आपण निरूपील ।।३६।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटिकायां शुकजनकसंवादो नाम दशमोऽध्यायः ।।१०।।

श्लोक ।।७।। ओंव्या ।।१३६।।

---

शब्दार्थ - १. तुझ्या वाक्याने, २. नाश, भस्म, ३. तेलाने, ४. वातीने, ५. ज्ञानाचा अनुभव, ६. न्यूनाधिक, ७. उत्पन्न झाले, ८. मानसिक व्यथा, ९. सुखज्ञानाने, १०. निवाऱ्यातला.

# अध्याय अकरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

विश्वामित्र उवाच – तस्य व्यासतनूजस्य मलमूत्रापमार्जन् । यथोपयुक्तं तद्राम तावदेवोपयुज्यते ॥१॥

श्रीव्यासाचा विरक्त पुत्र । सांगितले शुकाचें चरित्र । जनकें त्याचा विकल्पमात्र । केला निरहंकार द्वारपाळद्वारें ॥१॥ सज्ञानाचें कृपावचन । द्वारपाळद्वारें जाण । करोनि विकल्पाचें दहन । पूर्ण समाधान श्रीशुकासी ॥२॥ जैसी विरक्ती शुकासी । तैसी विरक्ती श्रीरामासी । राज्यवैभव नावडे त्यासी । नित्य विषयासीं विरक्त ॥३॥ श्रीरामा तुझें ध्यान गंभीर । शुकाच्या ऐसा निज विचार । त्वांही करावा श्रीगुरू साचार । विश्रांतीचें घर विवेकापासीं ॥४॥

वासनासंक्षयो नाम मोक्ष इत्युच्यते बुधैः । पदार्थवासनासाक्तिर्बंध इत्यभिधीयते ॥२॥

सकळ वासनेची शांती । या नांव मुख्य मुक्ती । विषयवासनाउत्पती । बद्धता निश्चितीं या नांव ॥५॥ देही असोनि विदेहस्थिती । ज्यासी नाहीं विषयासक्ती । त्यासी बोलिजे जीवन्मुक्ती । जाण निश्चितीं रघुनाथा ॥६॥

विश्वामित्र श्रीरामांना स्वकुलगुरुकडूनच उपदेश घेण्यास सुचवितात : यावरी श्रीरामाचें मनोज्ञान। शुकाच्या ऐसें संपूर्ण । विश्वामित्रें सांगावे ज्ञान । तें जणोनि चिन्ह ऋषि बोले ॥७॥

रघूणामेष सर्वेषां प्रभुः कुलगुरूं सदा । सर्वज्ञः सर्वसाक्षी च त्रिकालमलदर्शनः ॥३॥

रामा तुज द्यावया समाधान । उपदेशावया ब्रह्म ज्ञान । वसिष्ठ कुळगुरू सज्ञान । सदा संपन्न षड्गुणैश्वर्यें ॥८॥ भूत भविष्य वर्तमान । त्रिकाळ ज्ञाता सर्वज्ञ । अंतर्यामी साक्षी पूर्ण । गुरुत्वें गहन श्रीवसिष्ठ ॥९॥ सूर्यवंशी जे जे उत्पन्न । त्यांसी वसिष्ठ सांगे ज्ञान । श्रीवसिष्ठाचें ज्ञानमहीमान[1] । हरि हर आपण वंदिती स्वयें ॥१०॥ तुजऐसा कुळगुरू असतां । मी उपदेशूं नये रघुनाथा । तरी वसिष्ठासी अनन्यता । ज्ञानप्रात्यर्थ शरण रिघें ॥११॥ पुढीलाचा शिष्य अति वरिष्ठ । त्यासी चाळवी तो गुरू भ्रष्ट । उपदेशी तो ज्ञाननष्ट । अति पापिष्ठ प्रलोभें[2] ॥१२॥ कुळीं असतां सज्ञान गुरू । त्यासी त्यागी तो पापिष्ठ नरू । स्वयें उपदेशी तो पापाचारू । हा निजनिर्धारू ज्ञानोपदेशीं ॥१३॥ वसिष्ठ ज्ञानगुरू सूर्यवंशीं । त्याच्या शिष्यासी जो उपदेशी । तेणें जोडिल्या पापराशी । गुरुत्वें शिष्यासी उपदेशितां ॥१४॥ यालागीं गा रघुपती । पावावया ब्रह्मप्राप्ती । वसिष्ठ ज्ञानगुरूसी प्रार्थी । तेणें तूं विश्रांति पावसी सुखें ॥१५॥ ऐसें सांगोनि श्रीरामासी । विश्वामित्र बोले वसिष्ठासी । पूर्णाधिकार रघुनाथासी । तूं कां उपदेशीं उदास ॥१६॥ वसिष्ठा तूं काहीं स्मरतोसी । पूर्वीं वैर आम्हां तुम्हांसी । तें वैर शांत करावयासी । ब्रह्मा उपदेशी निजगुह्यज्ञान ॥१७॥ या गुह्यज्ञानाच्या पोटीं । मीतूंपणाची मावळे गोष्टी । वैर निमाले उठाउठीं । स्वानंदपुष्टी आम्हां दोघां ॥१८॥ ज्या स्वानंदाचिये स्थिती । आम्हां तुम्हां जाली अति प्रीती । विकल्प नुपजे कल्पांती । तेंचि श्रीरामाप्रती उपदेशीं ॥१९॥ तें ज्ञान विसरलों म्हणसी । आठव विसरातें स्वयें ग्रासी । नाठवतां आठव अहर्निशीं । विसरू त्यापासीं असेना ॥२०॥

गुरुशिष्यांचा अन्योन्य संबंध : ज्ञानाची ज्ञानगंभीरी[3] । विरक्त शिष्याचे सुक्षेत्रीं । उततिष्ठे[4] निर्जनिर्धारीं । ते गुरुची खरी गुरुगरिमा ॥२१॥ कामक्रोधादि महाज्वाळें । ज्याचे शिष्याचें ज्ञान न पोळे । तेणें गुरुत्वें अति प्रांजळें । अदग्ध सोज्ज्वळें तें ज्ञान ॥२२॥ शिष्याचे विकल्प समस्त । खंडोनि निर्विकल्प करीत । तेंचि ज्ञान अखंडित । शुद्ध शास्त्रार्थ या नांव ॥२३॥ शुद्ध शास्त्रार्थ प्रतिपादिती । तेचि सद्गुरू उपदेशिती । ज्या शिष्यासी होय प्रतीती । त्या

---

शब्दार्थ – १. ज्ञानाचा महिमा, २. फार लोभाने, ३. ज्ञानाची खोली, ४. राहते, नांदते.

गुरुत्वाची ख्याती हरिहरा वंद्य ॥२४॥ शिष्यासी नाहीं ब्रह्मप्रचीती । शब्दज्ञानें सतेज युक्ती । मनीं विषयांची आसक्ती । ते जाण निश्चिती अशिष्य ॥२५॥

अशिष्यायाविरक्ताय यत्किंचिदुपदिश्यते । तत्प्रयात्यपवित्रत्वं गोक्षीरं श्वदृतावित ॥४॥

अशिष्य कोण? : मनुष्यदेहांचिया प्राप्तीं । संसार तरावया गुरुभक्ती । ऐसा भाव नाहीं ज्याचे चित्तीं । तो जाण निश्चितीं अशिष्य ॥२६॥ ज्यासी विषयवासना चित्तीं । ज्यासी संसारावर आसक्ती । लौकैषणेची[1] अति प्रीती । तो जाण निश्चितीं अविरक्ता ॥२७॥

परशिष्याला उपदेश करणे निंद्य : ऐशियातें जे उपदेशिती । ते अपवित्र उपदेशस्थिती । जेवीं श्वानचर्मपात्राप्रती[2] । गोक्षीर भरिती धारोष्ण ॥२८॥ परशिष्यासी उपदेशन । तें गुरुत्वासी अति दूषण । अशिष्यासी सांगावे ज्ञान । तें निंद्य पूर्ण सर्वार्थें ॥२९॥ सच्छिष्यासी सद्गुण । देखोनि सांगावें गुह्य ज्ञान । त्या गुरूचें गुरुत्व धन्य । परम पावन परमार्थी ॥३०॥

वसिष्ठ ऋषींची योग्यता : हें विश्वामित्राचें वचन । ऐकोनियां अति गहन । सिद्ध साधक ऋषिजन । करिती स्तवन धन्य धन्य ॥३१॥ व्यास नारद याज्ञवल्की । शुकप्रमुख शौनकीं । विश्वामित्रातें निजमुखीं । सकळिकीं पुन: पुन: स्तविजे ॥३२॥ जो ब्रह्मज्ञानाचा महामेरू । जो स्वानंदाचा सुखसागरू । तो बोले वसिष्ठ ऋषीश्वरू । चित्तचमत्कारू वचन ज्याचें ॥३३॥ ब्रह्मयापासोनी ब्रह्मप्राप्ती । परी ब्रह्मयासमान ज्ञानशक्ती । वचनमात्रें ब्रह्मप्राप्ती । सच्छिष्य पावती स्वानंदें ॥३४॥ ज्ञान वैराग्य औदार्य ख्याती । यश श्री ऐश्वर्यस्थिती । हे साही गुण वसिष्ठासी असती । भगवंत म्हणती तेणें त्यासी ॥३५॥ सूर्यवंशीं निजसन्मार्नी । गुरुत्वें जो मुकुटमणी । रायें पूजिला अनुदिनीं । जो वरासनीं उपविष्ट[3] ॥३६॥ वसिष्ठे करितां उपदेश । शिष्य तत्काळ होय निरास । त्या निरासतेची काय । जेणें सावकाश धरिली असे ॥३७॥ श्रीराम अधिकारिशिरोरत्न । परी न पुसतां ब्रह्मज्ञान । सांगों नये गा आपण । हें मुख्य लक्षण उपदेशीं ॥३८॥

शिष्याच्या विनंतीशिवाय त्याला उपदेश करणे व्यर्थ : वसिष्ठाची महाख्याती । सूर्य जिंतिला दंडशक्ती । तो विश्वामित्राप्रती । उपदेशस्थिती सांगत ॥३९॥ सद्गुरूतें न प्रार्थितां । शिष्य आदरें न पुसतां । ज्ञान सांगो नये गा सर्वथा । सांगे तो तत्वतां गुरू मुर्ख ॥४०॥ गुरू स्वयें म्हणे शिष्यास । तूं घे माझा उपदेश । तेव्हांच गुरुत्व पडिलें सोस । वाढला असोसे[4] गुरुत्व-लोभें ॥४१॥ यालागीं शिष्यें न पुसतां जाण । आपण सांगों नये ब्रह्मज्ञान । जरी राम अधिकारिरत्न । तरी अप्रश्नीं[5] ज्ञान सांगों नये ॥४२॥ शिष्य उपदेशी उदासभूते[6] । गुरू साक्षेपी[7] उपदेशार्थ । तेणें गुरुत्वा जाला घात । अविवेकें लोलुप शिष्यार्थीं ॥४३॥

वसिष्ठांनी विश्वामित्राची केलेली स्तुती : विश्वामित्रा तुझी आज्ञा । माझेनि न करवे अवज्ञा । आतां सांगेन ब्रह्मज्ञाना । साधूची आज्ञा मज वंद्य ॥४४॥ विश्वामित्रा तूं साधुरत्न । सुरवरां वंद्य महिमान । क्षत्रिय होत्साता ब्राह्मण । स्वयें ज्ञानें संपूर्ण वश्य केलें ॥४५॥ त्या तुज साधूची निजाज्ञा । हरिहरां न कवे अवज्ञा । यालागीं मी रघुनंदना । गुह्यज्ञाना सांगेन ॥४६॥ माझे तुझे वैरा शांती । जें उपदेशिलें प्रजापतीं । ते अखंड स्मरे स्फूर्ती । संसारप्रवृत्तिनिवर्तकें[8] ॥४७॥ तेणें ज्ञानें मी आपण । उपदेशीन रघुनंदन । ज्या उपदेशासी विघ्न । कल्पांती जाण बाधेना ॥४८॥ विघ्नचि होय निर्विघ्न । प्रपंच होय चैतन्यघन । शिष्य होय ब्रह्म पूर्ण । अज्ञान तें ज्ञान होवोनि ठाके ॥४९॥ ऐसा हे गुह्य स्थिती । उपदेशीन श्रीरामाप्रती । हे वसिष्ठाची वचनोक्ती । ऐकोनि निश्चितीं सुखावे राम ॥५०॥ मग वसिष्ठासी श्रीराम आपण । सद्भावें घाली लोटांगण । अनन्यभावें तुज मी शरण । मी शिष्य पूर्ण गुरुवर्या ॥५१॥ ऐसा सद्गदित

---

शब्दार्थ – १. लोकास प्रिय होण्याची, २. कुत्र्याच्या कातड्यावर, ३. बसलेले, ४. हावरेपणा, ५. विचारल्यावाचून, ६. विरक्त, ७. आग्रही, खटपटी, तत्पर, ८. संसारापासून निवृत्त करणारे.

कृपावचन । करुणा भाकी दीनवदन । स्वामींनी कृपा करावी आपण । मज दीना उद्धरावें ॥५२॥ जेवी दीपें गवाक्षांसी[१] दीप्ती । तीं गवाक्षें दीपासी नेणती । तेंवी तुझेनि सूर्यवंशा ज्ञानप्राप्ती । ते तुझी ज्ञानस्थिती मी नेणें ॥५३॥ तुझें अगाध ब्रह्मज्ञान । तें मी नेणेंचि अज्ञान । तूं कुलगुरू सनातन । म्हणोनि चरण दृढ धरिले ॥५४॥

श्रीरामांची योग्यता : श्रीराम स्वयें चैतन्यघन । देवकार्यार्थ अवतार पूर्ण । करावया धर्मसंरक्षण । मनुष्यपण नटनाट्य ॥५५॥ तेणें पैं म्हणविता अज्ञान । ब्रह्मीं ब्रह्मत्व न्यून । अथवा म्हणवितां सज्ञान । ब्रह्मीं ब्रह्मत्व पूर्ण अधिक नव्हे ॥५६॥ एवं ज्ञानाज्ञानातीत । श्रीराम स्वयें सदोदित । तोही लोकसंग्रहार्थ[२] । गुरुत्वें वंदित वसिष्ठतें ॥५७॥ देवांनि सद्गुरुसी सन्मान । श्रीराम न पुसता ब्रह्मज्ञान । तैं ज्ञानमार्ग विच्छिन्न[३] । स्वयें आपण केलासें होय ॥५८॥ करावया दीनोद्धारा । गुरुशिष्यपरंपरा । स्थापावया रघुवीरा । कळवळा पुरा ज्ञानमार्गी ॥५९॥

श्रीरामांची वसिष्ठांना विनम्र विनंती : यालागीं श्रीराम आपण । केवळ होवोनि अज्ञान । गुरुत्वें वसिष्ठासी सन्मान । देवोनि ब्रह्मज्ञान विनीतत्वें[४] पुसे ॥६०॥ घेवोनि अज्ञानत्वाची बुंथी[५] । केवळ अज्ञानप्रश्नोक्ती । स्वयें पुसताहे रघुपती । तेही उपपत्ती अवधारा ॥६१॥

श्रीराम उवाच –

प्राक्तनं वासनाजालं नियोजयति मायया । मुने तथैव तिष्ठामि कृपणः किं करोम्यहम् ॥५॥

ऐकें मुनि सावधान । जैसे माझें पूर्व प्राक्तन । मी त्या प्रारब्धाधीन । स्वयें कर्तेपण मज नाहीं ॥६२॥ पाहतां प्रारब्धाकडे । मी तंव केवळ बापुडें । म्यां काय करावें पुढें । हे धडपुढें[६] लक्षेना ॥६३॥ देह असतां प्रारब्धाधीन । जेणें होय ब्रह्मज्ञान । तैसी कृपा करावी परिपूर्ण । ज्ञानविज्ञानपरिपाकें ॥६४॥

वसिष्ठ वाच –

अंते वयसि हे राम श्रेयः प्राप्तोति शाश्वतम् । स्वप्रयत्नोपनीतेन पौरुषेणैव नान्यथा ॥६॥

मनुष्याने देहाचा उपयोग ब्रह्मज्ञान व ब्रह्मप्राप्तीकडेच करावा : मनुष्यदेहीं ब्रह्मप्राप्ती । तो देहभाव नसावा चित्तीं । विदेहत्वें परमार्थगती । विवेकसद्युक्ति निज पुरुषार्थ ॥६५॥ नरदेहाऐसें गोमटें । शोधितां त्रैलोक्यीं न भेटे । आणि देहाऐसें वोखटें । अत्यंत खोटे आन नाहीं ॥६६॥ वोखटें[७] म्हणोनि त्यागावें । तरी मोक्षसुखा नागवावें[८] । गोमटें[९] म्हणोनि भोगावें । तें अवश्य जावें अधःपाता[१०] ॥६७॥ हें भोगवे ना त्यागावे । निजपुरुषार्थलाघवें । भगवन्मार्गीं लावावें । तरीच पावावें परम सुख ॥६८॥ ऐकें बापा रघुनाथा । या युक्तीच्या पुरुषार्था । साधूनियां पावावें परमार्था । उपाव अन्यथा असेना ॥६९॥

शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहंती वासनासरित् । सा मनः पुरुषार्थेन योजनीयेति मे मतिः ॥७॥

प्रथम मनोजय व तो होण्यासाठी वासनानियंत्रण : मनोरथ नानावृत्ती । या नांव वासनासरिता म्हणती । इयेमाजी बुडाले नेणों किती । बळी ते तरती निज पुरुषार्थें ॥७०॥ शुभाशुभ वासना ओघ । सबळ बळें वाहती अनेक[११] । ते विवेकें मोडोनि सांग । परमार्थीं चांग[१२] पुरुषार्थ कीजे ॥७१॥ त्या पुरुषार्थाचें लक्षण । अशुभ[१३] वासना त्यागून । परमार्थीं दृढ राखावें मन । हे मुख्य लक्षण परमार्थाचें ॥७२॥ बाळक लाविजे अभ्यासीं । शनैःशनैः[१४] योग्यता होय त्यासी । तेवीं आत्मअनुसंधानें चित्तासी । सावकासीं राखावें ॥७३॥ अनुसंधान[१५] सांडिता चित्ता । वळवून लावावें परमार्था । येविषयीं करावें पुरुषार्था । चित्तजयार्था साटोप[१६] ॥७४॥ दांत खावोनियां नेहटीं[१७] । लागावें मनोजयाच्या पाठीं । हात चुरीनियां उठाउठीं । मनोजय दृष्टीं लक्षावा

शब्दार्थ – १. खिडक्यांना, २.लोकाचाराकरिता, ३. मोडला; बंद पाडला, ४. नम्रतेने, ५. आवरण, आच्छादन, ६. नीट चांगलेसे, ७. वाईट, ८. फसावे, नाहीसे करून घ्यावे, ९. चांगले, १०. नरकास, ११. पुष्कळ, १२. चांगला, उत्तम, १३. वाईट, १४. हळूहळू, १५. लक्ष्य, संदर्भ, १६. प्रयत्नासहित, १७. जोराने.

॥७५॥ अंगें आवरोनियां अंग। मनोजय करावा सांग । हाचि परमार्थाचा मार्ग । अति अव्यंग[1] रघुनाथा ॥७६॥ सावधान अहोरात्र । चित्तें लक्षावें चिन्मात्र । हेंचि परमार्थाचें सूत्र । अति पवित्र निजनिष्ठा ॥७७॥ मनें मना सावधान । मनें मना निर्दाळण । मने मना अनुसंधान । या नांव पूर्ण पुरुषार्थ ॥७८॥ सकळांच्या वित्पत्ती[2] । अनभ्यासें शांत[3] होती । तैसी नव्हे ज्ञानस्थिती । क्षणार्धे प्राप्ती प्रबळे[4] स्वयें ॥७९॥

वेदशास्त्राध्ययनाने ज्ञानार्जन व साधना : वेदशास्त्र श्रुति पुराण । नाना कळा अति विंदान । अनभ्यासें होय क्षीण । ज्ञानाचें लक्षण ऐसें नव्हे ॥८०॥ ज्ञान प्राप्तकाळीं जाण । अभ्यासेंविण वाढे पूर्ण । जन्ममरण करी क्षीण। तंव तंव प्रबळपण[5] ज्ञानाचें ॥८१॥ साधक ज्ञान सांडूं पाहे । सांडूं जातां अधिक होय । ऐसी ज्ञानकळेची सोय । सुलभत्वें आहे सुखरूप ॥८२॥ ज्ञानसुलभत्वें सुखप्राप्ती । तरी कां साधक सदा शिणती । त्यांसी अनुताप नाहीं चित्तीं । अवैराग्यें प्राप्ती ज्ञानाची नव्हे ॥८३॥ यालागीं आपण । महत्त्व सांडोनिया पूर्ण । रंकाचे रंक होऊनि जाण । ज्ञानगवेषण[6] करावे ॥८४॥ भूक नाहीं ज्याचे पोटीं । तो पंचामृत पायें लोटी । तेवीं अवैराग्यें करंटी । शुद्ध ज्ञानेंसीं भेटी शिणता नोहे ॥८५॥

वरं शरावहस्तस्य चांडालागारवीथिषु । भिक्षार्थमटनं रामं न मौर्ख्यं हंत जीवितम् ॥८॥

हातीं घेवोनि खापर । ज्ञानार्थ चांडाळाचे घरोघर । भीक मागणें श्रेष्ठ सधर[7] । परि मूर्ख शरीर त्याहूनि निंद्य ॥८६॥ मूर्खत्वें सार्वभौम पूर्ण । तें सोलींव दुःख दारुण । जो ज्ञान पावोनि अकिंचन[8] । तो वंद्य जाण ब्रह्मादि देवां ॥८७॥ तें पावावया निजज्ञान । विवेकवैराग्य-संपन्न । सद्गुरूसी रिघता शरण । तैं मूर्खपण मावळे ॥८८॥

श्रीराम उवाच-

एवंस्थिते बद्धमुक्ते कथमेतज्जने स्थिते । क्रमो गुरुपदेशस्य स्वात्मज्ञानस्य करणम् ॥९॥

खऱ्या ज्ञानासाठीं गुरुशिष्यांच्या आत्मैक्याची जरुरी : ऐसिया स्थितीं आचार्या । वर्ततां जगज्जाळमाया । कैसेनि तरिजे गुरुवर्या । सांग त्या उपाया आत्मप्राप्तीलागून ॥८९॥ गुरुवाक्यें ब्रह्मप्राप्ती । ऐसीं श्रुतिशास्त्रें गर्जती । ते प्राप्तीची निजसिथती । पावेन निश्चितीं गुरुराया करीं ॥९०॥

वसिष्ठ उवाच-

उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनम् । ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवलम् ॥१०॥

गुरुपदेशाचिया गोष्टी । नाहीं ज्ञानाची भरली वाटी । जे शिष्याचे लावी होटीं । ब्रह्मज्ञान पाठीं पावेल ॥९१॥ गुरुपासीं नाहीं ज्ञानाचा गोळा । जो गिळवी शिष्यासी तत्काळा । गुरुरुपें नाहीं ज्ञानधनमोटळा[9] । जे शिष्याजवळां स्वयें दे ॥९२॥ गुरूने देइजे आपण । शिष्यें घेइजे अंजुळीपूर्ण । तैसें नव्हे ब्रह्मज्ञान । अतर्क्य विंदान ज्ञानप्राप्तीचें ॥९३॥ उपदेशक्रम रघुनाथा । गुरू न सांगोनि सांगा । शिष्य कानेंवीण ऐकतां । प्राप्ति परमार्था तैं लाभे ॥९४॥

सावधानता व चित्तशुद्धीची आवश्यकता : दृष्टीनें देखिजे सावधान । तेंचि कूर्मीच्या[10] पिल्यां अमृतपान । दृष्टि तरळतांचि[11] जाण । पडे लंघन तयांसी ॥९५॥ तेवीं श्रीगुरुशिष्यें‍सीं एकात्मता । तेणें शिष्य लाभे परमार्था । अणुमात्र भाव पालटतां । उपदेशरिता पडे शिष्य ॥९६॥ गुरु सांगे गुह्य ज्ञान । शिष्य तें त्यजूनी सेवी गुण वर्ण । वर्णावर्णदेहाभिमान । गेलिया मन ज्ञान स्वयें लाभे ॥९७॥ सच्चिदानंदनिजवार्ता । गुरू सांगे शिष्यस्वार्था । शिष्य स्वार्थी

शब्दार्थ - १. परिपूर्ण, २. अर्थज्ञान, ३. नाहीशी होतात, ४. वाढते, ५. मोठी वाढ, ६. ज्ञानाचा शोध, ७. अधिक, ८. भिकारी, दरिद्री, ९. ज्ञानरूपी धनाचे पुडके-गाठोडे, १०. कासवीच्या, ११. चंचळ होताच.

सांडोनि चिंता । तरीच परमार्था पाविजे ॥९८॥ ज्या शिष्याचे चित्तीं चिंता । देहगेहादि[1]-अति-ममता । तो गुरूपदेशीं नित्य रिता[2] । प्राप्ति परमार्था की नव्हे ॥९९॥ विषयस्वार्थ ज्याचे पोटीं । तो आस्थेच्या सांगे दोन चार गोष्टी । ते प्रज्ञा[3] अतिशये चोरटी परमार्थभेटी होवों नेदी ॥१००॥ यालागी तत्काळ । पवावया ब्रह्म प्रबळ । एकी शिष्यप्रज्ञाचि गा केवळ । परमार्थफळ तेणें लाभे ॥१॥ शिष्यासी नाहीं चित्तशुद्धी । त्यासी शास्त्रें नव्हे आत्मबुद्धी । तो शास्त्र विकूनियां विषय साधी । हित त्रिशुद्धी नव्हेचि शास्त्रें ॥२॥ शिष्या चित्ती विषयासक्ती । गुरूपदेशें नव्हे परमार्थप्राप्ती । तो उपदेश जाय व्यर्थ अंतीं । करी विपरीत ज्ञानगर्वें ॥३॥ उपदेश स्वयें व्यर्थ गेला । सर्वेचि ज्ञानगर्व घेवोनि आला । ज्ञातेपणें ताठा चढला । नायके बोला श्रेष्ठांच्या ॥४॥ स्वयें उपदेश केला व्यर्थ । परी वाढला अति अनर्थ । चित्तशुद्धी नाहीं सत्य । तेथें परमार्थ कदा न घडे ॥५॥ चित्तशुद्धि ज्याचे मनीं । तो परमार्थ पावे पाषाणीं । कळे चित्तशुद्धीची करणी । दावी जनीं वनी जनार्दन ॥६॥

राम उवाच –

इयतो दृश्यजातस्य ब्रह्मांडस्य जगत्स्थिते : । मुने सत्ता कथं तत्र क्व मेरू: सर्षपोदरे ॥११॥

या प्रचंड ब्रह्मांडाचे आकलन व्हावे कसे असा श्रीरामांचा प्रश्न : साधकभावनेच्या पोटीं । दृश्य-जाळेसीं ब्रह्मांडकोटी । हरपती उठाउठी । राईच्या पोटीं मेरू जेवीं न मावे ॥७॥ ब्रह्मभावना सूक्ष्म सपूर[4] । तीमाजी दिसे तें चराचर । केवीं हरपे जगडंबर । शमक गिरिवर गिळील कैसा ॥८॥

वसिष्ठ उवाच –

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् । तीद्दनेनैव नो मासैः प्राप्तोसि परमां धियम् ॥१२॥

गुरूत्वाम्याशी तादात्म झाल्यावर कुलगुरूचे उत्तर : साधुत्वें पाहतां साधूसी । मुख्य साधुत्व सद्गुरूसी । तो जें स्वात्मत्व उपदेशी । सच्छास्त्र त्यासी बोलती ज्ञाते ॥९॥ त्या गुरूवाक्यीं एकात्मता । शिष्य जालिया सर्वात्मता । तो दिवस मास न लागतां । योग्य परमार्था तत्काळ होय ॥११०॥ तत्काळ होय योग्यता। हाही विलंबू न साहे सर्वथा । हृदयीं सिद्धचि निजात्मता । गुरुवाक्य पाहतां नैराश्य लाभे ॥११॥ केवळ तंतु पाहतां दृष्टी । वस्त्र लोपे उठाउठी । सूक्ष्मब्रह्म लक्षितं दृष्टी । ब्रह्मांडकोटी मावळती ॥१२॥ मरोनियां जो मेला । तो मागुतेन जन्मा आला । जो जिताचि जिवें निमाला। तो सुखी जाला सत्संगें ॥१३॥ पाहातां सूक्ष्मदृष्टी सावधान । । शून्याचें हरपे शून्यपण । तैं जो होय ब्रह्म पूर्ण । साधुसज्जनसमागमें ॥१४॥ जंव जंव नाहीं होय देहो । तंव तंव सुखाचा उत्सव । निःशेष होय देहाचा अभाव । परमानंद पहा हो सत्संगें ॥१५॥

सत्संगमहिमा : सत्संगें ज्या अकिंचनता । तो ब्रह्मादिकां वंद्य सर्वथा । त्रैलोक्यवैभवा[5] हाणोनि लाथा । ऐसी प्रसन्नता सत्संगें ॥१६॥ ऐसिया सत्संगापरतें । श्रेष्ठ साधन नाहीं येथें । त्या सत्संगमहिमेतें । ऐक निश्चितें सांगेन ॥१७॥ सत्संगें नाहीं द्रष्टेपण । पुढे दृश्य नाहीं जाण । देखतेवीण दर्शन । तें ब्रह्म पूर्ण रघुनाथा ॥१८॥

दृश्य, द्रष्टा व दर्शन ह्यांची संपुटी : दृश्य द्रष्टा दोहींतें । दर्शन प्रकाशे निश्चितें । तें दर्शन आकळे जयातें । ब्रह्मस्थिती त्यातें अभंग ॥१९॥ साकरकणिता[7] भिन्न भिन्न । परी त्या कणिका साकरचि आपण । तेवीं चराचर दृश्यमान । तें ब्रह्म पूर्ण पूर्णत्वें ॥१२०॥ उंच नीच अलंकार । परी ते एकचि भांगार[8] । तेवीं पाहतां चराचर । वस्तु परात्पर परब्रह्म ॥२१॥ म्हणती घटाकाश मठाकाश । परी ते सहजचि महदाकाश । तेंवी दृष्य दर्शनीं द्रष्टाभास । भासतो चिद्विलास चिन्मयत्वें ॥२२॥ या निजात्मदृष्टि पाहतां । विषयीं विषयो ब्रह्मरूपता तेचि उपपत्ती तत्वतां । ऐकें रघुनाथा सांगेन ॥२३॥

---

शब्दार्थ – १. देह, घर, इत्यादी, २. रीकामा, ३. बुद्धी, ४. परिपूर्ण, ५. जगाचा विस्तार, ६. दरिद्र, ७. साखरेचे कण, ८. सोने.

पांच प्रकारच्या विषयांच्या त्यागाची आवड हाच आनंद : मुख्य विषयो पंचविध[१] । शब्द स्पर्श रूप रस गंध । यांची गोडी तो परमानंद । आत्मविद[२] जाणती ॥२४॥ विषयांचे गोडपण । ते गोडीच ब्रह्म पूर्ण । ते गोडीचे जें ज्ञातेपण । ते चैतन्यघन जाणावें ॥२५॥ यस्यानंदस्य मात्रा जीवंति । विषयगोडी ते ब्रह्मस्फूर्ती । भोक्ता भोगी स्वयें चिच्छक्ती । जाणीव ते निश्चितीं परब्रह्म ॥२६॥ यालागीं गा रघुनाथा । जेणें जाणिजे विषयस्वादता[३] । ते जाणीव आली ज्याच्या हाता । तो जाण तत्वता स्वदेहीं ब्रह्म ॥२७॥

श्रीराम उवाच –

येनैव भगवन्धीरा निश्चयेन महाधिया । विशोकाः संस्थितास्तन्मे ब्रह्मन्प्रब्रूहि तत्त्वतः ॥१६॥

विशोकावस्था कशाने प्राप्त होते असा श्रीरामाचा प्रश्न : मागील धीर वीर परमार्थी । पावले विशोक ब्रह्मप्राप्ती । ते विशोकतेची स्थिती । मज का निश्चितीं प्रकटेना ॥२८॥ ऐसी उपदेशीं ज्ञानपदवी । जे धैर्यातें धैर्यचि आंगवी[४] । अंग अंगातें स्वयें हरवी । विशोक सर्वभावीं जेणें मी होय ॥२९॥ ब्रह्मज्ञानाच्या उपपत्ती । सांगितल्या नाना युक्ती । जेणें सद्यः[५] पावें ब्रह्मप्राप्ती । ते मज निश्चितीं सांगा स्वामी ॥१३०॥

वसिष्ठ उवाच –

श्रूयतां ज्ञानसर्वस्वं श्रुत्वा चैवावधारयेत् । भोगेच्छामात्रको बंधस्तत्त्यागो मोक्ष उच्यते ॥१४॥

कुलगुरूंचे उत्तर : ऐकें बापा रघुवीरा । सांगेन ज्ञानाच्या सर्व सारा । जो श्रवणार्थी चातक खरा । तो वाक्यसुखसारा[६] झेलोनि घे ॥३१॥ ज्ञानकथा अवघेची ऐकती । परी ऐकिलें तें नाचरती । यालागीं श्रवणाची होय माती । परमार्थप्राप्ति त्यां कैची ॥३२॥

लक्षपूर्वक न ऐकण्याने नुकसान : पावन कथा ज्ञानगर्वोक्ती[७] । अनवधानें[८] ते श्रवण न निवती । मा ते चित्तामाजी[९] केवी पावती । त्यांची मनाची वस्ती उद्वस[१०] सदा ॥३३॥ ऐसी निजकथा ऐकती । ते ऐकतांचि नायकती । त्यासी परमार्थाची प्राप्ती । कदा कल्पांती घडेनां ॥३४॥ ऐकें श्रीरामा सावधान । येथें भोगेच्छा मुख्य बंधन । ते त्यागी तो ज्ञाता पूर्ण । तेथें मुक्तपण सहजची ॥३५॥ इच्छात्याग अति कठीण । जो त्यागी तोचि विचक्षण । त्याही त्यागाचें लक्षण । निर्वाण खूण अवधारीं ॥३६॥

मनानेच मानाचा निग्रह : मनें मनातें आवरावें । मने मनातें निग्रहावें । मने मनातें धरावें । मनें मारावें मनातें ॥३७॥ मनें मनाचा निग्रहो ऐसा । तेथें समूळ निमे[११] आशा । चैतन्याचा ओते देहठसा । प्रपंच आपैसा[१२] परब्रह्म होय ॥३८॥ ऐसिया सूक्ष्म अति युक्तीं । परब्रह्माची सद्यःप्राप्ती। स्वयें परब्रह्मची आहाती । प्राप्ती अप्राप्ती भावाभावें ॥३९॥ स्वयंभू हृदयीं ब्रह्मस्थिती । ब्रह्मप्रभा इंद्रियवृत्ती । तें अभावें ब्रह्म नव्हे म्हणती । सद्भावें होती परब्रह्म ॥१४०॥ या सद्भावाची उपपत्ती । निश्चयें सांगेन रघुपती । दृढ धरावी सावधानवृत्ती । हे ब्रह्मस्थिती अभंग ॥४१॥ जेथें कामक्रोधा सलोभता । निःशेष नाहीं ते ब्रह्मशांतता । ते शांति ब्रह्म स्वभावता । सबाह्य पूर्णता सर्व देहीं ॥४२॥ ज्यासी मी म्हणिजे आपण । तें मीपणेंचि वपु चैतन्य । इंद्रियांचें कर्माचरण । तेंही आचरण पूर्णब्रह्मत्वें ॥४३॥ काया वाचा मनसा आचरण । तें तें सहजें ब्रह्म पूर्ण । हे ज्यासी आकळली[१३] खूण । तों तत्काळ जाण परब्रह्म जाला ॥४४॥ तो तत्काळ जाण परब्रह्म जाला । म्हणतां लाज लागली पैं बोला । स्वयें ब्रह्मरूपें संचला[१४] । जाला न जाळा ज्ञानाज्ञानें ॥४५॥ यालागीं गा रघुनाथा । स्वतः सिद्ध ब्रह्मरूपता । स्वयें स्वयंभू ये हाता । या श्लोकार्था विनटोनी ॥४६॥ इंद्रियांचे कर्माचरण । सर्व देहीं समसमान । तें कर्मयोगीं सावधान । ब्रह्मानुसंधान निजनिष्ठा ॥४७॥ योगी स्वधर्मकर्म[१५] करिती । कर्मीं स्फुरे

शब्दार्थ – १. पाच प्रकारचा, २. आत्मज्ञानी, ३. विषयांची गोडी, ४. जोडी, अंकुरित करि, ५. तकाळ, तत्क्षणीच, ६. बोलण्यातील तात्पर्य, ७. ज्ञानाने परिपूर्ण भरलेले भाषण, ८. लक्षण न दिल्याने, ९. मग, १०. ओस, शून्य, ११. मरते, नाहीशी होते, १२. आपोआप, १३. कळली, साधली, १४. भरला झाला, १५. लक्षून.

ब्रह्मप्रचीती । तेचि परमात्म्याची निजभक्ती । नित्य मुक्ती सावधात्वें ॥४८॥ योगी जागृतीं सावधान । चित्सावधानत्वें देखती स्वप्न । सुषुप्तिसुखें समाधान । चिद्रूप पूर्ण भोगिती सदा ॥४९॥ ऐसा अवस्थात्रयीं[१] सावधान । हेंचि भगवंताचे भज । हेंचि परमात्मयाचें पूजन । हेंचि समाधान जीवशिवांचें ॥१५०॥ ऐसा सद्भावें साचार । जो सावधान चिरंतर । त्यासी ब्रह्मरूप चराचर । विषयमात्र चिद्रूप ॥५१॥

यदिदं किंचिदाभाति जगज्जालं प्रदृश्यते । तत्सर्वममलं ब्रह्म बहिरंतर्व्यवस्थितम् ॥१५॥

आपणाला जे जे दिसते ते ते सर्व ब्रह्मच होय : जें जे दिसे दृश्य दर्शन । जें जें विषभोगायतन[२] । तें तें निर्मळ ब्रह्म जाण सबाह्य पूर्ण परब्रह्म ॥५२॥ मा हें एकैक सांगों किती । त्यासी ब्रह्मरूप त्रिजगती । सहज ठसावे रघुपती । तेही उपपत्ती अवधारीं ॥५३॥ ब्रह्म दृश्य द्रष्टा दर्शन । ब्रह्मचतुर्दश भुवन । भूतपरंपरा ब्रह्म पूर्ण । मी म्हणणें तें मीपण परीब्रह्मत्वें ॥५४॥ ब्रह्मरूपें भासती मित्र । ब्रह्मरूपें भासती पुत्र । शत्रु भासती चिन्मात्र । सुहृद समग्र सद्रूपत्वें ॥५५॥ शत्रु मित्र सखे बंधु । हा परब्रह्मी अपवादु । ब्रह्म केवळ स्वानंदकंदु । परमानंदु परिपूर्ण ॥५६॥ ब्रह्मीं प्रपंच नाहीं ऐकिला । ब्रह्मी प्रपंच नाहीं आथिला[३] । ब्रह्मीं प्रपंच नाहीं स्पर्शला । भ्रांती भाविला निजभावना ॥५७॥ भ्रांतासी जग दुःखाप्रतीती । ज्ञात्या सुखरूप विश्वमूर्ती । अंधा दगड पडे त्रिजगती । देखणे देखती स्वप्रकाशकत्वें ॥५८॥ यालागीं ज्या परमाबुद्धी । ते तोडिती भेदाची विधी । भेद तोडावया त्रिशुद्धी । भगवद्बुद्धी सर्वत्र ॥५९॥ ज्या ब्रह्मभावों सर्वभूतीं । ते स्वये परब्रह्म होती । ते पूर्वीच ब्रह्म आहेती । भावनाभ्रांतिच्छेदक ॥१६०॥ जो करी अमृतपान । तो अमर होय आपण । ज्या सर्वभूतीं भगवद्भजन । ते परब्रह्म पूर्ण स्वयें होती ॥६१॥ ऐकें श्रीरामा जगाची स्थिती । परब्रह्म कां परम भ्रांती । तिसरियाची नाहीं वस्ती । जाण निश्चितीं रघुनाथा ॥६२॥ नानाकारें जगाची प्रचीती । तेचि मुख्यत्वें सोलींव भ्रांती । तें भ्रांतीची निजस्थिती । ऐंक तुजप्रती सांगेन ॥६३॥

भ्रमेणाहं भ्रमेण त्वं भ्रमेणोपासका जनाः । भ्रमेणेश्वरभावत्वं भ्रममूलमिदं जगत् ॥१६॥

अहंभावना हा भ्रम असून ते भ्रांतीचे मूळ लक्षण आहे : अहमात्मा जें मीपण । ते मुख्य भ्रमाचें निजकारण । तूं म्हणणें हा भ्रम दारुण । मीतूंपण भ्रममूळ ॥६४॥ देव भक्त दोनी भिन्न । ऐसें जें कां उपासन । तें ज्ञानाचें मुख्य अज्ञानपण । सूक्ष्म भ्रम पूर्ण अतर्क्यत्वें ॥६५॥ ब्रह्म अखंडत्वें पूर्णस्थिती । तेथें देव भक्त भिन्न मानिती । हें ज्ञानगुह्य अति भ्रांती । अतर्क्य निश्चितीं सज्ञाना ॥६६॥ ईश्वर तो अति वरिष्ठ । येरें भूतभौतिकें[४] अति कनिष्ठ । हे भ्रमाचें अति कचाट[५] । येथें श्रेष्ठ श्रेष्ठ भुलविले भ्रमे ॥६७॥ दोरीं सर्प जन्मला नाहीं । तो उपजे भ्रांतीचे ठायीं । तेवीं ब्रह्मी जग नाहीं । आभासे पाहीं भ्रममूळें ॥६८॥ जग देखणें हा परम भ्रम । जग न देखणें ते परब्रह्म । हें जाण गुह्य निजवर्म[६] । तूं पुरुषोत्म परमात्मा ॥६९॥ मी तुज सांगो तरी तूं परमात्मा । तुझा तूंच पाहें महिमा । तुझ्या स्वरूपासी नाहीं सीमा । अपार अप्रमेय[७] रघुनाथ ॥१७०॥ तूं आत्मा आत्मत्वें परिपूर्ण । तू कर्माकर्म विहीन । तुज नाहीं स्थान मान । तें निजलक्षण अवधारीं ॥७१॥ तुझ्या स्वरूपाच्या निजस्थानीं । आकाश लोपें कोणे कोणीं । पाहतां न दिसे नयनीं । गेलें हरपोनी मिथ्यात्वें ॥७२॥ पाहतां स्वरूप शुद्धत्वें । लाजिले पैं शोधितां सत्वें । स्वयें सामावलें महत्वें । मायेच्नें सत्व असत्वा आलें ॥७३॥ राईच्या कोटीच्या अशांप्रती । वस्तु सावकाशें नांदती । अणुमाजी सुखस्वरूपस्थिती । वस्तुविश्रांति सावकाशें ॥७४॥ सूक्ष्माहुनि सूक्ष्म सार । जें नित्यत्वें नित्याक्षर[८] । तें तुझें स्वरूप साचार । जीवशिवत्वें विचार अव्ययी विरें ॥७५॥

---

शब्दार्थ – १. जागृती, स्वप्न व सुषुप्तीत, २. विषयभोगाचे स्थान, ३. झाला, ४. पंचमहाभूतांपासून झालेली, ५. कुलंगडे, ६. ज्ञानातील गुप्त वर्म, ७. निश्चय करण्यास अशक्य असा. ८. नित्य व अविनाशी.

**वस्तूला माता पिता नाहीत म्हणून जन्ममरणही नाही :** वस्तूसी नाहीं माता पिता । यालागीं न घडे जन्मकथा । जन्मेंवीण मरणवार्ता । आत्मत्वीं सर्वथा असेना ॥७६॥ एवं जन्ममरणातीत। अपार सुखें सदोदित । त्या स्वरूपा नांव रघुनाथ । जाण निश्चित श्रीरामा ॥७७॥ वेद वेदांग पुराण । श्रुति स्मृति शास्त्र विज्ञान । इतिहासाचें गुह्य ज्ञान । तें हें निरूपण रघुनाथा ॥७८॥ सर्व साराचें मुख्य सार । तो हा इतिहास साचार । सकळ ज्ञानाचें ज्ञानगव्हर[१] । अति उदार मुक्तत्वें ॥७९॥ हें निरूपण जीवीं घोटे[२] । तैं विषयांचें लाहाणें[३] फिटे । जन्ममरणाचें खत[४] फाटे । भवभय आटे मृगजळत्वें ॥१८०॥ या इतिहासाचें निजवर्म । कर्मचि होय परब्रह्म । साधक होय आत्माराम । नित्यत्वें परम निजमोक्ष जोडे ॥८१॥ म्यां निरूपिलें जें निरूपण । तें जीविन्मुक्ताचें लक्षण । तूं आत्माराम आपण । पूर्णत्वें पूर्ण परमात्मा तूं ॥८२॥

**श्रीरामांची पूर्णानन्दमय अवस्था :** ऐकोनि वसिष्ठाचें वचन । श्रीराम स्वयें आपण । आपुलें देखे पूर्णपण । स्वानंदघन सुखरूप ॥८३॥ होतां स्वरूपीं भेटीं । चित्तचैतन्या पडली मिठी । हर्षबाष्प दाटलें कंठीं । आनंद पोटीं न समाये ॥८४॥ आनंद हृदयीं न माये । तो नेत्रीं उलथूं[५] पाहे । पूर्ण दाटला विस्मयें । देहाची सोय स्फुरेना ॥८५॥ प्राण पांगुळला[६] जेथींचा तेथ । कंठ जाहला सद्गदित । इंद्रिये उपरमलीं[७] समस्त । पाडिलें ताटस्थ्य चिद्रूपत्वें ॥८६॥ सर्वांगीं रोममूळीं । आली स्वेदकणिका[८] निर्मळी । मुक्तमोतियांची जाळी । पांघुरविली निजसत्वें ॥८७॥ निःशेष नाठवे मी तूंपण । खुंटली वाचा पडिलें मौन । जीवशिवाचें पुसिलें भान । चित्त समाधान पावलें ॥८८॥ श्रीराम चैतन्यघन । जाला स्वस्वरूपीं निमग्न । त्यासी व्यवहारप्रवीण । श्रीवसिष्ठें केवीं आपण केलें ॥८९॥ ऐसें भरद्वाजें वाल्मीकाप्रती । स्वयें पुसिलें अति प्रीतीं । वाल्मीकीही तदर्थीं । कथासंगती सांगतु ॥१९०॥

**वाल्मीकिरुवाच–**

**यदा परिणतः साधुः स स्वरूपे महात्मनः । विश्वामित्रस्तदोवाच वसिष्ठं ऋषिसत्तमम् ॥१७॥**

तटस्थ देखोनि श्रीरामासी । विश्वामित्र जाला कासाविसी । तो कळवळोनि वसिष्ठासी । निजकार्यायी सांगत ॥९१॥

**विश्वामित्र उवाच–**

**हे वसिष्ठ महाभाग ब्रह्मपुत्र महामुने । गुरुत्वं शक्तिपातेन तत्क्षणादेव दर्शितम् ॥१८॥**

**श्रीरामांची समाधी उतरण्याबद्दल विश्वामित्रांची वसिष्ठांना विनंती :** स्वामी वसिष्ठा तू ब्रह्मपुत्र । तुझ्याच गुरुत्वाचें चरित्र । ब्रह्मप्राप्तीं तूं अति पवित्र । अति विचित्र अनुपम्य ॥९२॥ तुझ्या गुरुत्वाचें वर्म । मिथ्या देहादि इंद्रियकर्म । शिष्य होय पूर्ण ब्रह्म । ते समाधि परम श्रीरामीं ॥९३॥ शक्तिपातें शिष्योत्तमा । पावविलें न करितां श्रमा । हे तुझ्या गुरूत्वाची गरिमा[९] । अगाध महिमा तिहीं लोकीं ॥९४॥ शिष्याच्या सकळ वृत्ती । वचनें लाविसी ब्रह्मस्थिती । शिष्य पावे ब्रह्मस्थिती । शक्तिपातु निश्चिंती या नांव ॥९५॥ लव निमिष घटिका मुहूर्त । शिष्यासी बाणली हे स्थिती । शक्तिपातु निश्चिंतीं । ऐसी ख्याति गुरुवाक्ये ॥९६॥ वचनें छेदिसी संशयातें । निःशब्दें बोधिसी शब्दार्थें । हस्तमस्तकसामर्थ्यें[१०] । शिष्य परमार्थें सुखी करिसी ॥९७॥ असो दर्शन स्पर्शन । मुख्य तुझें कृपावलोकन । शिष्यासी सहज समाधान । चैतन्यघन चित्सुखें ॥९८॥ चित्सुखें सुखसंपन्न । हें तुझ्या कृपेचें आयतन[११] । तुझे कृतेस्तव पूर्ण । ब्रह्मसमाधान श्रीरामीं ॥९९॥ श्रीरामीं पूर्ण समाधिअवस्था । ठेली[१२] कर्मक्रियाकर्तव्यता। पुढील अवतारकार्यार्था । वसिष्ठा वृथा होऊं नेदी ॥२००॥ स्वामी वसिष्ठा अवधारीं । कृपा करीं आम्हांवरी । श्रीराम ये देहावरी । ते युक्तीं विवरीं स्वसत्ता ॥१॥ सर्व इंद्रिया सदा उब्दोध ।

---

शब्दार्थ – १. ज्ञानाची गुहा, ज्ञानाचे स्थान, २. ठसावेल, ३. कर्ज देणे, ४. रोखा, ५. बाहेर येऊ लागला, ६. कुंठित झाला, ७. विश्रांती पावली, स्थिर झाली, ८. घामाची बिंदू, ९. मोठेपणा, १०. डोक्याला हस्तस्पर्श होताच, ११. स्थान, १२. बंद राहिली.

कर्मकर्तव्या नित्य सावध । माझा यज्ञ होय सिद्ध । तैसा प्रबोध[1] करीं रामा ॥२॥ समाधि आणि उत्थान । दोहीं अवस्थांचे तुज ज्ञान । शिष्यासी देसी समाधान । सर्वेचि प्रयोजन बोधिसी ॥३॥ करावया सुरकार्यार्थ । अवतार श्रीरघुनाथ । तो त्वां केला समाधिस्थ । ठेला तटस्थ निर्व्यापारें ॥४॥ श्रीराम होतां तटस्थ । खुंटला अवतारकार्यार्थ । माझेंही कार्य तेथ । यज्ञसिद्धयर्थ राहिलें ॥५॥ माझ्या कार्याचें स्मरण । वसिष्ठा धरीं आठवण । ज्यालागीं येवोनि आपण । केलें प्रार्थन दशरथाचें ॥६॥ वसिष्ठा तूंच आपण । दशरथासी प्रार्थून । मज दिधले राम-लक्ष्मण । यज्ञरक्षण करावया ॥७॥ हें तुझें वाक्य होईल मिथ्या । देवकार्यार्थ राहील सर्वथा । यालागीं श्रीरघुनाथा । कृतकार्यार्था प्रबोधीं ॥८॥ अनागत[2] भाष्य ऋषि वाल्मीकें आपण । केलें शतकोटि रामायण । तें मिथ्या होऊं नेदीं वचन । श्रीरघुनंदन प्रबोधी ॥९॥

सिद्धाश्रमं मया नीतो रामो राक्षसमर्दनम् । करिष्यते ततोऽहल्यामुक्तिं च जनकात्मजाम् ॥१९॥

**श्रीरामचरित्राचे श्रवणपठण करणारे सर्व उपाधीतून तरतील :** अनागत भाष्य अति पवित्र । वदलें वाल्मीकांचे वक्त्र । श्रीरामाचें चरित्र । अति विचित्र अवधारीं ॥२१०॥ ताटका अति विकटक[3] । रामें निर्दाळिली आत कंटक[4] । जनवन केलें निष्कंटक । सिद्धाश्रमीं लोक सुखें वसती ॥११॥ ते सिद्धाश्रमीं माझें स्थान । तेथें अणिला रघुनंदन । करूनि राक्षसमर्दन । जयो संपूर्ण श्रीरामें ॥१२॥ करील अहल्योद्धारण । शिवचापप्रभंजन । जानकीचें पाणिग्रहण । चहूं बंधूचें लग्न जनकालयीं स्वानंदें ॥१३॥ जामदग्न्य श्रीराम । युद्धीं पावती सुख परम । परशुरामासी उपरम[5] । जाला परम श्रीराम ॥१४॥ श्रीरामाचें वनाभिगमन । तेणें दंडकारण्य पावन । तीर्थां पवित्रता पूर्ण । श्रीरामचरण शिववंद्य ॥१५॥ समुद्रीं शिळा स्वयें तरती । बिभीषणा लंकाप्राप्ती । रामनामाची ख्याती । त्रिजगती उद्धरील ॥१६॥ सीताशुद्धीनेचि छळें[6] । निर्दळील राक्षसकुळें । राम वंदिजे कळिकाळें । तें चरित्र प्रांजळें वसिष्ठा करीं ॥१७॥

यर्दृष्टो यैः स्मृतो वाप्पि बोधितो यैः श्रुतोति यैः । सर्वावस्थागतानां तु जीवन्मुक्तिं प्रदास्यति ॥२०॥

जिहीं अत्यंत आदरेसीं । ऐकिलें श्रीरामचंद्रचरित्रासी । जे राम स्मरती अहर्निशी । मुक्ति त्यांसी अनायासें ॥१८॥ जो सार्थकें करी रामस्मरण । जो सार्थकें परिसे नित्य आपण । ते दोघे जीवन्मुक्त जाण । इंद्रियाचरण करितांही ॥१९॥ ज्यांचे मुखीं रामनामाची वस्ती । जे सदा रामनाम जपती । त्यासी स्वदेहेंसी नित्य मुक्ती । इंद्रियार्थीं रमतांही ॥२२०॥ जे अवस्थात्रयीं[7] नित्यमुक्त । जे सदा राम जपत । श्रीराम स्वयें तेथ । असे क्रीडत स्वानंदें ॥२१॥ ऐसी त्रैलोक्याची गती । श्रीरामचरित्रे तरती । श्रीवसिष्ठा कृपामूर्ती । माझी कार्यसिद्धी श्रीरामें ॥२२॥ श्रीराम पुरुषोत्तम । श्रीराम परात्पर[8] परम । श्रीराम तो पूर्ण ब्रह्म । नित्य निष्कर्मसिद्धि श्रीराम ॥२३॥ त्या श्रीरामाची स्थिती गती । श्रीवसिष्ठा तुझे हाती । आमुचिया कृपास्थिती । श्रीराममूर्ति प्रबोधीं ॥२४॥ श्रीराम सदोदित दैवहीन । परी रामापाशीं नाहीं दैन्य । जगाचेनि भाग्य आपण । श्रीरघुनंदन प्रबोधीं ॥२५॥ दैवेंवीण भाग्यवंत । जगीं एक श्रीरघुनाथ । तो वृत्ति पावोनियां येथ । चरित्रार्थ संपादू ॥२६॥ सर्व जगीं विजयी पूर्ण । ऐसा जो कां रघुनंदन । त्यासीं माझे निजमन । जो जगज्जीवन जगाचा ॥२७॥ वसिष्ठा आमुचे कृपेंवारीं । श्रीरघुनाथासी प्रबोधा करीं । तो अवतारचरित्र करी । तो ये व्यवहारीं प्रवर्तवीं ॥२८॥

वाल्मीकिरुवाच-

इत्युपत्वा स स्थितस्तूष्णीं विश्वामित्रो महामुनिः । वसिष्ठस्तु महातेजा रामचंद्रमभाषत ॥२१॥

---

शब्दार्थ - १. उपदेश जागृती, २. भविष्य काळाविषयी सांगितलेले, ३. विक्राळ, ४. रानटी क्रूर, ५. शांती, विश्रांती, ६. मिषाने निमित्ताने, ७. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या तीन अवस्थात, ८. सर्वांत श्रेष्ठ.

हे ऐकून वसिष्ठांकडून श्रीरामांची समाधी दूर करण्याचा प्रयत्न : वाल्मीकि सांगे भारद्वाजासी । तटस्थ देखोनि श्रीरामासी । विश्वामित्र वसिष्ठासी । रामप्रबोधासी प्रयोजी ॥२९॥ तंव विश्वामित्र आपण । श्रीरामानुवाद बोलोन । निजकार्यार्थी धरोनि मौन । तें वसिष्ठ सर्वज्ञ जाणोनि बोले ॥२३०॥

राम राम महाबाहो महापुरुष चिन्मय । नायं विश्रांतिकालो हि लोकानंदप्रदो भव ॥२२॥

समाधिलक्षण : ऐकें बापा रघुनाथा । तुज कायसी समाधी अवस्था । तूं काळाचा आकळिता । चिदानंदता स्वरूपें ॥३१॥ परिसें आजानुबाहु[1] महाभुजा । हा समाधिकाळ नव्हे तुझा । तूं त्रैलोक्याधिराजा । देवसमाजा समग्रा सुखीं करीं ॥३२॥ सुखी करीं साधुसंत। सुखीं करीं निजभक्त । सुखी करीं लोक समस्त । अवतारचरित्रानुक्रमें ॥३३॥ केवळ निष्कर्म राहणें । तें जीवसमाधीचें लक्षण । तेहीं केवळ अपक्कपणें । परिपक्क चिन्ह तें ऐके ॥३४॥ सर्व भूतांचे गुणगुण । जगाचें दोषदर्शन[2] । दिसतां न मोडे ब्रह्मपण । ते समाधि पूर्ण पूर्णत्वें ॥३५॥ भूतांचे विकर्माचरण । भासतां भासें चैतन्यघन । त्या नांव शुद्ध समाधान । समाधि संपूर्ण त्या नांव ॥३६॥ एसें न होतां समाधान । केवळ जें तटस्थपण । तें मुग्धावस्थेचें लक्षण । समाधि संपूर्ण ते नव्हे ॥३७॥ भूतांचे सकळ मळ । ज्याचे दृष्टीं होती निर्मळ । ते समाधि-सुखकल्लोळ[3] । येर समूळ भूतादिभाव ॥३८॥ आशंका – म्हणती संसार मिथ्याभूत । तुवांचि करून दिधला येथ । तेथें कैंचा देव कैंचा भक्त । अवतारचरित्र तें कैचें ॥३९॥ जेथें नाहीं मीतूंपण । तेथें नाही कर्मक्रियाचरण । समूळ लौकिक नाहीं जाण । लोकसंरक्षण म्हणसी कैंचें ॥२४०॥ अवधारीं गा रघुनाथा । ब्रह्मअवताराची निजसत्ता । नये जीवांचिये हाता । जरी यथार्थता मुक्त जाले ॥४१॥ जयां त्रिगुणमे[4]जीवपण । भ्रमें भुलोनि आपण । ब्रह्म म्हणती कैंचें कोण । तयां उद्धरण तुझेनी ॥४२॥ अवताराचें सामर्थ्य पूर्ण । प्रपंचपरमार्थी सावधान । उभयतां दिसों नेदी न्यून । ते निजचिन्ह अवधारीं ॥४३॥

अंतरेको बहिर्नाना अंतर्बोधो बहिर्जडः । अंतस्त्यागी बहिःसंगी लोके विहर राघव ॥२३॥

बाह्याभ्यन्तर स्थितीचा विचार : अंतरीं आत्मा अद्वैत एक । तेणें मिथ्या समूळ लोह । बाह्य कर्म जाणोनि संपादी लौकिक । विधिपूर्वक वेदोक्त ॥४४॥ अंतरीं केवळ शुद्धबुद्ध । बाह्य दिसे जैसा विषयबद्ध । जडत्वें भासे जैसा मुग्ध[5] । दिसे शुद्ध विषयार्थी ॥४५॥ अंतरीं निःशेष विषयत्याग। बाहेंद्रियां विषयभोग। भोगितां दिसे जरी सांग। तरी विषयाचें अंग आतळेना[6] ॥४६॥ अंतरी पूर्ण निरास[7] । बाह्य लोलुपत्वें[8] करी आस । जेंवि मस्केंमाजी[9] आकाश । फुगल्या आभास अडकलें दिसे ॥४७॥ अंतरीं निरपेक्ष[10] निर्मळ । बाह्य नाना अर्थीं तळमळ । लाघवी लोक झकवी सकळ । तैसी कळवळ मुक्तासी ॥४८॥ अंतरी काम क्रोध निमाले। शांतीचें कल्याण पाहलें[11]। बाह्य क्रोधानळें खवळले । जेवीं मृगजळें मासेमारी ॥४९॥ बाह्य कार्यकारणावेशा । गुरगुर करी व्याघ्र जैसा । अंतरी मृदु लोणी तैसा । कोणाही सहसा खुपेना ॥२५०॥ बाह्य दिसे कार्यकरिता । परी अंतरीं अकर्ता निजात्मता । माशी कुलालचक्रीं[12] भवता । दिसे परी तत्वतां हलेना ॥५१॥ प्रपंच आणि परमार्थीं । उभयंता सावधस्थिती । हे अवताराची अवतारशक्ती । ते तुज निजमूर्ति रघुनाथा ॥५२॥ ऐसिये गा स्थितीवरी । तूंही निजात्मचरित्रीं । स्वानंदें क्रीडें संसारीं । लोकाचारीं अविकळत्वें ॥५३॥ जेवीं बुद्धिबळें वाडेंकोडे । मिथ्या राजा मिथ्या प्रधान हत्ती घोडे । हे जाणोनि खेळ खेळी पुढें । तेवीं सोंकटियां जीवभाव नाहीं । तरी मारिलें म्हणती पाहीं । तेवीं मुक्त मुक्ताकडे भवभाव[13] ॥५४॥

शब्दार्थ – १. गुडघ्यापर्यंत ज्याचे हात पोचतात असा, २. दोष दिसणे, ३. समाधिसुखाची लाट, ४. त्रिगुणांच्या मिश्रणाने, ५. विचारशून्य, ६. स्पर्श करणे, ७. विरक्त, ८. लोभाने, लुब्धतेने, ९. कातड्याच्या पिशवीमध्ये, १०. निरिच्छ, ११. उजाडले झाले, १२. कुंभाराच्या चाकावर, १३. प्रापंचिक महाअवस्था.

देहींच विदेही । भय नाहीं मरणाचें ॥५५॥ सोंकटी निमालियाही पाठीं । कोण धर्मात्मा चढे वैकुंठी । कोण पडिले नरकसंकटीं । तेवीं निजात्मदृष्टी भव मिथ्या ॥५६॥ ऐसिया स्थितीवरी । तूंही सुखें संसारीं । स्वानंदे क्रीडा करीं । भय न धरीं श्रीरामा ॥५७॥ राजा प्रधान पशु प्यादा कटक । बुद्धिबळीं अवघें काष्ठ येक । तरी करिती खेळाचें कौतुक । तैसे सांसरिक मुक्तासी ॥५८॥ ऐसिया योगाची वृत्ती । रघुनाथा रघुपती । त्वांही सुखें संसाराप्रती । स्वानंदस्थिती क्रीडावें ॥५९॥

तस्माद्राज्यादिविषयान्पर्यालोच्य विनश्वरान् । देवकार्यादिसंभारांस्त्यज पुत्र सुखी भव ॥२४॥

हे सर्व लक्षात आणून समाधिविसर्जन करावे : वोडंबरीचा[१] आंबा सफळ । रस गोड परी मिथ्या मूळ । तेवीं मिथ्या लौकिक सकळ । जाणोनि अविकळ[२] लोक संरक्षीं ॥२६०॥ बहुरूपियाची राव राणी । नसोनि करिते संपादणी । तेवीं तूं श्रीराम राजा राजपणीं । मर्यादारक्षणीं वेदोक्त ॥६१॥ तुवांही निजअवतारवृत्तीं । सुखें असावें संसाराप्रती । धर्ममर्यादा पुरोणोक्ती । स्वानंदस्थिती क्रीडावें ॥६२॥ तोडीं नवग्रहांची बेडी । सोडवीं देवांची बांधवडी[३] । उभवी रामराज्याची गुढी । आज्ञा धडफुडी तिहीं लोकीं ॥६३॥ सांडी समाधीची भ्रांती । धनुष्य बाण घेवोनि हातीं । रामनामाची ख्याती । त्रिजगती उद्धरीं ॥६४॥ एसें वसिष्ठ सांगतां । रामा परमानंदीं तल्लीनता । त्याच्या प्रबोधाची कथा । होय सांगता वाल्मीक ॥६५॥

वाल्मीकिउवाच–

इत्युक्तोपि यदा रामः किंचिन्नोचे लयं गतः । तया सुष्मुम्नया सोपि प्रविष्टो हृदयं शनै ॥२५॥

श्रीराम पूर्वस्थितीप्रत येईनात म्हणून वसिष्ठांनी सुषुम्ना नाडीत प्रवेश करून त्यांचे प्रबाधन केले म्हणून सर्वांस आनंद : यापरी श्रीरघुनाथा । वसिष्ठें स्वये प्रबोधितां । रामा परमानंदीं लयंगता[४] । कार्यकार्यार्थ स्फुरेना ॥६६॥ ऐसें जाणोनियां पूर्ण । तेव्हा वसिष्ठें आपण । सुषुम्नां नाडीं प्रवेशोन[५] । करी प्रबोधन श्रीरामा ॥६७॥ वसिष्ठ चैतन्यरूप आपण । तेणें चेतना चेतविली पूर्ण । चेतनें चेतविला प्राण । सावधान । हृदय करणें ॥६८॥ प्राण प्रवेशे सोळा सवडी । तणें चेतविल्या सर्वही नाही । तेणें नेत्रांची झांपडी । शनैः[६]शनैः[६]गाढी उघडिता जाय ॥६९॥ उन्मीलित[७] दोनी नयन । श्रवण जालें शब्दायतन[८] । शरीर जालें सावधान । परी जीवपण असेना ॥२७०॥ श्रीरामाच्या निजदेहीं । मुळीच जीवपण नाहीं । तो देहींच विदेही । चैतन्यविग्रही श्रीराम ॥७१॥ नातळता[९] जीवशिवपण । यापरी श्रीरघुनंदन । स्वयें जाला सावधान । वसिष्ठे पूर्ण बोधिला ॥७२॥ प्रबोधोनि श्रीरघुनंदन । वसिष्ठें उन्मीलित केले लोचन । विश्वामित्रा आनंद घन । सुरगण संतोषले ॥७३॥ सुखावले ऋषीश्वर । आनंदले मुनिवर । अवघे करिती जयजयकार । श्रीरामचंद्रप्रबोधें ॥७४॥ न देखे गुणोषदर्शन । न देखें विधिनिषेधलक्षण न देखे कर्माकर्मपण । श्रीरघुनंदनप्रबोधीं ॥७५॥ यापरी श्रीरघुनंदन । स्वयें जाला सावधान । तो बोलिला विविधविधान । तेंचि कथन अवधारा ॥७६॥

श्रीराम उवाच –

न विधिर्न निषेधश्च त्वत्प्रयादादहं पुनः । तथापि तव वाक्यं तु करणीयं हि सर्वदा ॥२६॥

सर्वे शृणुत भद्रं वो निश्चयेन सुनिश्चितम् । आत्मज्ञानात्परं नास्ति गुरोरपि च तद्विः ॥२७॥

ऐकें गा वसिष्ठा महामुनी। तुझें वाक्य प्रतापकरणी। विधि निषेध हे दोनी। मी मनीं नयनीं। देखें ना ॥७७॥ ऐके स्वामी मुनिनाथा । तुझी गुरुवाक्यसमर्थता । कर्म क्रिया कर्तव्यता । मज सर्वथा उरली नाहीं ॥७८॥ कर्म कार्य कर्तव्यता । मज उरली नाहीं तत्वता । तरी तुझें वाक्य गुरुनाथा । मज सर्वथा अनुल्लंघ्य ॥७९॥ तुझेनि वाक्यें जैसे तैसे । जें बोलसी अनायासें ।

शब्दार्थ – १. जादुगिरीचा, २. विकारशून्य, ३. बंधन, ४. तल्लीनता, ५. जागृती, ६. हळूहळू, ७. अर्धवट उघडलेले, ८. शब्दांचे स्थान, ९. न शिवता.

ते मज सर्वथा आयासें । अति विश्वासें करणीय[1] ॥२८०॥ सद्गुरूचें निजवचन । प्राणांतींही नुलंघी पूर्ण । तेंचि शिष्याचें निजलक्षण । जे परिपाळण गुरुवाक्य ॥८१॥ वेद शास्त्र स्मृति पुराण । तेथें हेंचि लक्षण । जें गुरुवाक्याचें परिपालन । हेंचि विधान विधियुक्त ॥८२॥ गुरुवाक्योल्लंधन । हेंचि महापाप दारुण । महापापा प्रायश्चितविधान । वज्रपाप पूर्ण गुरुवाक्यावज्ञा[2] ॥८३॥ गुरुअवज्ञापरिपाटीं[3] । महापातकें ज्याच्या अंगुठीं । ऐशिया पापांच्या उठती कोटी । वज्रपापांच्या कोटी गुरुअवज्ञा ॥८४॥ गुरुअवज्ञेची मात । स्वधर्मकर्मा करी घात । अंगीं रोकडा वाजे[4] अनर्थ । नरकपात अनिवार ॥८५॥ सूक्ष्म साराचा सार गुण । सकळ निश्चयां निश्चयो पूर्ण । अवघे ऐका सावधान । आत्मज्ञान महालाभ ॥८६॥ आत्मज्ञानेंवीण सकळा । चवदा विद्या चौसष्टी कळा । त्या दुःखरूपें अवधिया विकळा । सुखसोहळा आत्मज्ञानीं ॥८७॥ सकळसिद्धांतमर्यादा । मुख्यज्ञान आत्मविद्या । येरी अवघिया अविद्या । ज्या प्रसिद्धाचवदाही ॥८८॥ त्या आत्मज्ञानाचा निजज्ञाता । सद्गुरूहूनि अधिकता । नाहीं अधिक दैवता । मुख्य गुणातीत[5] तो वंद्य ॥८९॥ ब्रह्मा आणि हरि हर । तेही सद्गुरूचे किंकर[6] । सद्गुरूहूनि थोर । नाहीं सत्पात्र तिहीं लोकीं ॥२९०॥ ऐसें बोलता आपण । प्रेमें वोसंडला[7] रघुनंदन । वसिष्ठाचे श्रीचरण । शिरीं पूर्ण वंदिलें ॥९१॥ श्रीरामपादाभिवंदन । वसिष्ठें दिधलें आलिंगन । एकाजनार्दना शरण । पूर्ण समाधान गुरुशिष्या ॥९२॥ ऐकोनी रघुनाथाच्या गोष्टी । चवदा भुवनेंसी वैकुंठी । टाळी पिटिली उठाउठीं । गुरुमहिमा गोमटी ऐकोनी ॥९३॥ तेणें सुखी जाले सिद्ध ऋषीश्वर। सुखी जाले सुरवर । अवघे करिती जयजयकार । सुमनसंभार[8] वर्षले ॥९४॥ दिव्यसुमनांचा सडा । तो विराजे चहूंकडां । तेणें श्रीराम शोभला गाढा[9] । चिन्मात्र चोखडा सालंकृत ॥९५॥

वाल्मीकिउवाच –

एतत्ते सर्वमाख्यातं रामचंद्रकथानकम् । अनेकक्रमयोगेन भारद्वाज सुखी भव ॥२८॥

श्रीरामकथा श्रवणाची फुलश्रुती : वाल्मीक सांगे आपण । भारद्वाजा तूं सावधान । रघुनाथाचें आत्मज्ञान । प्रबोधलक्षण[10] अवधारिलें ॥९६॥ जें जालें ज्ञानश्रवण । त्याचें धरोनि अनुसंधान । तुवांही आपणा आपण । सुखी संपूर्ण करावें ॥९७॥ ऐसें सांगोनि भारद्वाजासी । वाल्मीक जाला संतोषी । त्या वसिष्ठाव्या वचनासी । अति उल्हासीं सतवीत ॥९८॥ धन्य वसिष्ठाची लीला । वंद्य सुरनरां सकळां । तेणें चिद्रात्नांची वचनमाळा । श्रीरामाचें गळां बाणली[11] ॥९९॥ तिचिया चिद्गंधासी । लाधोनियां[12] अहर्निशीं । कवि भ्रमरण जाले तिसीं । रसआमोदासी सेविती ॥३००॥ तिचिया पावोनियां योगासी । योगी पावले योग्यतेसी । तेणें सुखावोनि अहर्निशीं । देहभावासी विसरले ॥१॥ बाप गुरुवाक्यकटाखें । अलक्ष लक्षेंवीण लक्षे । वसिष्ठें निजगुरपक्षें । निजमोक्ष नांदवी ॥२॥ रामवसिष्ठकाहणी । हे मोक्षमार्गींची निशाणी[13] । मोक्ष रिघे येवोनि श्रवणीं । कथा सावधानीं अवधारीं ॥३॥

य इदं श्रृणुयान्नित्यं गुह्यं रामवसिष्ठयोः । सर्वावस्थोपि श्रवणान्मुक्तिमार्ग निगच्छति ॥२९॥

वेदांतवार्निका निजजीवन । उपनिषदांचे सार पूर्ण । ॐकारअर्धमात्रालक्षण । तें हें गुह्यज्ञान वासिष्ठ ॥४॥ श्रीरामवसिष्ठगुह्यज्ञान । त्याचे नित्य सावधान । जो सादर करी श्रवण । तो मुक्तत्वें पूण सर्वावस्थीं ॥५॥ ज्यासीं सार्थवासिष्ठश्रवण । ते प्रपंची वर्तता जाण । नभाणेसें अलिप्त पूर्ण । त्यांसी कर्मबंधन बाधीना ॥६॥ वसिष्ठभवणनित्यवस्ती । ज्यासी जागृति-स्वप्नसुषुतीं । त्यासी सर्वदा वरी मुक्ती । हे गुरुत्वें ख्याती वासिष्ठाची ॥७॥ जागृतीं वासिष्ठाचें श्रवण ! तेंचि स्वप्नी मनन। तेणें सुषुप्तीं समाधान । हे अगाध ज्ञान वसिष्ठाचें ॥८॥

---

शब्दार्थ – १. कर्तव्य, २. गुरुच्या शब्दांचे उल्लंघन, ३. गुरुची आज्ञा न पाळल्याने, ४. लागतो, ५. गुणांवेगळा, ६. नोकर, ७. भरला, ८. पुष्पवृष्टी, ९. बळकट, ज्ञानाचे लक्षण, १०. बिंबवली, प्रीतीतीस आणली, ११. प्राप्त करून घेऊन, १२. जिना, १३. योगवसिष्ठ.

वसिष्ठग्रंथशतसहस्री । त्यांतील श्लोकसत्त्याहत्तरीं । एकाजनार्दनें त्यावरी । ज्ञानार्थकारी टीका केली ॥९॥ श्लोकान्वयें सत्यार्थ । कर्ता जनार्दन समर्थ । तेथील जो ग्रंथार्थ । अर्थ विशद करी जनार्दनस्वामी ॥३१०॥ कथा ग्रंथार्थे अर्था आली । श्रीरामनामें पाल्हेजली । निजमोक्षमार्गी ठेवी झाली । ज्ञानकांडा केली समाप्ति ॥११॥ पदप्रमेयउथळखोली[1] । हे जनार्दन चालवी चाली । कवित्वाची सखोल बोली । बोलविता अविकळ जनार्दनु ॥१२॥ एका जनार्दना शरण । वसिष्ठांचे ज्ञाननिरूपण । त्याचे कृपेस्तव जाण । जालें संपूर्ण पूर्णत्वें ॥१३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीवसिष्ठरामसंवादो नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ ओंव्या ॥३१३॥ श्लोक ॥२९॥ एवं ॥३४२॥

## अध्याय बारावा

### ताटिका वध

श्रीसद्गुरूरामचंद्राय नमः । हे रामायणी निजकथा[2] । जैं आदरें ऐके श्रोता । तैं पापपुण्यांच्या करी घाता । स्वभावता नित्यमुक्त ॥१॥ कथाश्रवणें नित्यमुक्त । हाही नवलाव नव्हे येथ । अक्षरीं अक्षर[3] अक्षरार्थ । श्रीरघुनाथकथार्थे ॥२॥ पढतां रघुनाथचरित्र । श्रोते वक्ते नित्य पवित्र । धन्य ऐकती त्यांचे श्रोत्र । धन्य वक्त्र वदत्याचें ॥३॥ धन्य धन्य वाल्मीकि मुनी । श्रीरामकथा वदली वाणी । कथा त्रैलोक्यपावनी । भवमोचनी[4] चरितार्थ ॥४॥ रामनाम दों अक्षरीं । कुंटिणी वंदिजे सुरवरीं । ऐशी कथेची अगाध थोरी । ते कोणें वैखरीं वानावी ॥५॥ हें असो पूर्वकथासंबंधीं । श्रीरामासी लागे समाधी । ते स्वयें वसिष्ठ उद्बोधी[5] । ते कथाविधी अवधारा ॥६॥ श्रीराम जाला सावधान । प्रपंचपरमार्थस्थितीं समान । हे वसिष्ठांचे पूर्णपण । श्रीरामीं संपूर्ण बिंबले ॥७॥ सर्वेंद्रियी वित्तसमाधान । मिथ्या समाधिव्यत्थन[6] । कर्म क्रिया ब्रह्मपूर्ण । ऐसा सावधान श्रीराम ॥८॥

**श्रीराम सावध झाल्यामुळे सर्वांना आनंद :** देखोनि श्रीराम सावधान । विश्वामित्रा आनंद गहन। सुखावोनि सुरगण । केली संपूर्ण पुष्पवृष्टि ॥९॥ सुरी दुंदुभी त्राहाटिल्या[7] भेरी । निशाण त्राहाटिलें[8] राजद्वारीं । गगन गर्जे जयजयकारीं । पूर्ण सुरनरीं आल्हाद ॥१०॥ विश्वामित्राच्या यज्ञार्थ । स्वयें जाईल रघुनाथ । वसिष्ठें पाहोनि सुमुहूर्त । आल्हादे दशरथ प्रयाण करवी ॥११॥ करोनियां पुण्याहवाचन। राजा सवें सैन्य दे संपूर्ण । तें वसिष्ठें निवारून । रामलक्ष्मण रथारूढ करवी ॥१२॥

**श्रीराम रथारूढ होऊन निघाल्यावर राजाची विश्वामित्रांना विनंती :** राजा म्हणे विश्वामित्राप्रती । मीं आत्मा दिधला तुझें हातीं । यावरी तूं कृपामूर्ती । जाणसी त्या रीतीं संरक्षीं ॥१३॥ वसिष्ठ म्हणे विश्वामित्रासी । तुज गुरुत्व यावें सूर्यवंशीं । धनुविद्या सबीजेंसीं । श्रीरामासी उपदेशीं ॥१४॥ ऐकोनि वसिष्ठाचे वचन । विश्वामित्रें केले नमन । तूं अंतरात्मा आपण । मनोगत पूर्ण जाणसी माझें ॥१५॥ जाणोनी माझे मनोगता । शिष्य करावें म्हणसी रघुनाथा । तुजहीपरता ज्ञाता । आणिक सर्वथा असेना ॥१६॥ आपुलिया सच्छिष्यासी । कोणीं न द्यावें उपदेशासी । हें वसिष्ठा साजे तुजपासीं । इतर ऋषींसी अति अभिमान ॥१७॥

**श्रीरामांना धनुर्विद्या शिकविण्यासंबंधी वसिष्ठ विश्वामित्रांची एकवाक्यता :** वसिष्ठ म्हणे विश्वामित्रासी । मी तूं नाहीं आम्हां तुम्हांसी । यालागीं तूं श्रीरामासी । अवश्य होसी गुरुत्वें गुरु ॥१८॥ दोघां मुनींच्या वचनार्था । ऐकोनि आल्हाद रघुनाथा । दोहीं मुनींचे निजऐक्यता । उल्हासें रघुनाथ रथारूढ ॥१९॥ जीवासवें जैसा प्राण । तैसा रामासवें लक्ष्मण । तेणेंही केलें रथारोहण । धनुष्यबाणतूणीरेंसी ॥२०॥

---

शब्दार्थ - १. पदलालित्य आणि प्रमेय (सिद्धांत) हे सोपे असूनही गंभीर, २. अध्यात्मकथा, ३. नित्य, ४. संसारातून मुक्त करणारा, ५. उतरी, ६. व्युत्थान=समाधिविसर्जन, ७. वाजविल्या, ८. वाद्यविशेष (नौबत).

श्रीरामांच्या प्रयाणसमयी झालेले शुभ शकुन : श्रीराम करितां प्रयाण । स्वयें दशरथ पाहे शकुन । दोघे द्विज प्रसन्नवदन । फळेंसी पूर्ण भेटले ॥२१॥ पूर्णकलशीं सालंकृता । पुढें भेटल्या पंच योषितों[1] । दधि क्षीर नवनीत माथां । गोपवनितो[2] भेटल्या ॥२२॥ अपूर्व अमृत फळें क्षीरघागरी । दध्योदनेंसीं वायन करीं । हातीं कुमर कडे नोवरी । पुढे एक नारी भेटली ॥२३॥ सत्य जाती वायस । अपसव्य जाती तास । सन्मुख भेटले राजहंस । मुक्ताफळांचे घोस मुखीं धरूनी ॥२४॥ दक्षिणे जाती मृग कृष्णवर्ण । वामांगगामी मृगी पूर्ण । भारद्वाजाचें वाम उड्डाण । नकुळही आपण वामांगी सरके ॥२५॥

वसिष्ठांकडून शकुनांचे विवेचन : दशरथ जातां बोळवून । श्रीरामशकुनांचे शुभ चिन्ह । ब्रह्मरूपी वसिष्ठ आपण । मार्गीं व्याख्यान करून सांगे ॥२६॥ प्रथम भेटल्या ब्राह्मण । ब्रह्मसृष्टीमाजी जाण । जो विजयी होय संपर्ण । सुरासुरगण वंदिती ॥२७॥ पूर्णकलश जैं भेटती । तैं सदा पूर्णत्व मनोरथीं । दधि क्षीर भेटलिया नवनीतीं । तैं पूर्ण प्राप्ती ऐश्वर्याची ॥२८॥ सव्य गेलिया वायस । तो सर्वत्र पावे यश । अपसव्य गेलिया तास । शुद्ध निःशेष नासती ॥२९॥ मुक्तघोसीं सन्मुख । हंस भेटलिया देख । तो सर्वत्र पावे सुख । स्वप्नीही दुःख देखेना ॥३०॥ सव्य गेलिया मृगगण । अलभ्य लाभ पावे पूर्ण । मृगीचें वामगमन । तें नववधू आपण माळ घाली ॥३१॥ नकुळ गेलिया वामभागीं । तो विजयी होय रणरंगी । शत्रु निर्दाळील वेगीं । यश त्रिजगीं न समाये ॥३२॥ डावा गेलिया भारद्वाज[3] । तो करी सिद्ध काज । वैरियांसी लावोनि लाज । आनंदाचें भोज[4] नाचवी ॥३३॥ ऐसी सांगता शकुनगती । स्वये संतोषला नृपती । विजयी होईल रघुपती । हा निश्चय चित्तीं दृढ झाला ॥३४॥ दीड[5] गांव शरयूतीरीं । कामाश्रमाची अति थोरी । विश्वामित्रें तेथवरी । रथ चमत्कारीं कुमरेसीं नेला ॥३५॥

कामाश्रमात विश्रांती : कामाश्रमीं श्रीरामवस्ती तेणें सकळ काम सिद्धीस जाती । हे विश्वामित्राची निजयुक्ती । कार्यसिद्ध्यर्थीं राहविला राम ॥३६॥ श्रीराम आणि लक्ष्मण । निजतेजें विराजमान । करीं गोंधागुळित्राण[6] । धनुष्यबाण सन्नद्धे[7] ॥३७॥ काकपक्षशिखाधरे[8] । कवचीं[9] खड्गी महावीर । बाळपणीं अति दुर्धर । जेंवी वैश्वानर तेजस्वी ॥३८॥ त्याचें देखोनि स्वरूप । विश्वामित्रा सुख अमूप । श्रीराम लावण्याचा दीप । चित्स्वरूप सुखकारी ॥३९॥ ऋषि म्हणे तयांपती । येथे बसावे आजिचे रातीं । राम म्हणे आज्ञा निश्चितीं । सुखरूपें वस्ती करिते जाले ॥४०॥

सिद्ध मंत्राची विश्वामित्रांकडून प्राप्ती : विश्वामित्राचे संगतीं । सुखशयनीं क्रमिली राती । उदय होता गभस्ती । ऋषि प्रबोधीं[10] श्रीरामा ॥४१॥ विधियुक्त करोनि स्नान । संध्या गायत्री जपावर्तन । करूनि विश्वामित्रा नमन । स्वानंदें चरण वंदिल ॥४२॥ देखोनि श्रीरामविनीतता[11] । उल्लास विश्वामत्राचे चित्ता । आलिंगोनि श्रीरघुनाथा । कृपेनें बोले तो कृपाळू ॥४३॥ ऐकें बापा रघुनाथा । तुम्हांसी सिद्ध मंत्र देईन आतां । दोघीं चरणीं ठेविला माथा । सावधानता मंत्रार्थीं ॥४४॥ दृढ बाणल्या[12] मंत्रार्था । राक्षसभय नुपजे चित्ता । श्रम बाधेना सर्वथा । तिन्हीं अवस्था सावधान ॥४५॥ या मंत्रार्थाचिया प्रौढीं । रणांगणीं राक्षसक्रोडी । मारितां न उगे अर्ध घडी । तो मंत्र निरवडीं[13] सांगेन ॥४६॥ क्षुधा तृषा निद्रा आळस । बांधू न शके देहकार्श्य[14] । ऐशिया मंत्राचें मंत्ररहस्य । तुम्हांसी मी अवश्य सांगेन ॥४७॥ परम तपाची निवरडीं । जे म्यां जोडिली सिद्धार्थजोडी । ते तुज देईन रोकडी । म्हणोनि आलिंगी ॥४८॥ ऐसी कृपा देखोनि

---

शब्दार्थ – १. स्त्रिया, २. गौळणी, ३. कुकुडकुंभा, ४. सुख, ५. दीडगाव म्हणजे सहा कोस, ६. धनुष्याच्या दोरीचा धक्का न पडावा म्हणून हातात अंगुस्तन घालतात ते, ७. तयार, ८. झुलपे व शेंडी असलेले, ९. अंगात कवच-चिखलत असलेले, १०. जागा करी, उठवी, ११. रामाची नम्रता, १२. ठसावल्यावर, १३. युक्तीने, १४. शरीर कृश होणे.

पूर्ण । दोघीं धरिले दृढचरण । सर्वभावें सावधान । सद्गुरूवचनग्रहणार्थी ॥४९॥

मंत्रसिद्धीचा साक्षात्कार : मंत्राक्षर पडतां कानीं । सिद्धिपरिपाक[1] अंत:करणीं । मंत्रशक्ती लागे चरणीं । मंत्रशिरोमणि श्रीराम ॥५०॥ श्रीराम मंत्रीं मंत्राक्षर । श्रीराम क्षराक्षरातीत पर । श्रीराम स्वयें ॐकार । मंत्रार्थसार श्रीराम ॥५१॥ श्रीराम मंत्राची निजशक्ती । श्रीराम मंत्राची मंत्रमूर्ती । त्यासी मंत्रार्थ बाणला चित्तीं । हें नवल किती सांगावें ॥५२॥ मंत्रीं मंत्रार्थनिजबीज श्रीरामचि स्वयें सहज । तो वंदोनी सद्गुरूचरणरज । शिष्यत्वाची वोज[2] सेवकत्वें दावी ॥५३॥ सद्गुरूची निजसेवा । तेंचि निजबीज सकळ देवां । ते कळलेंसे राघवा । गुरुआज्ञे[3] जीवा विक्रीत केलें ॥५४॥ दोघां मंत्रार्थ बाणला पूर्ण । विश्वामित्रा कळली खूण । दोघांची पाटी थापटून । सुखसंपन्न स्वये झाला ॥५५॥

शरयूसंगमावर एक रात्र मुक्काम : रघुनाथासी म्हणे आपण । येथोनि करावे प्रयाण । राम म्हणे आज्ञा प्रमाण । रथीं तिथे जण बैसले ॥५६॥ कथाकौतुक मार्गानुक्रम । शरयूतीर मनोरम । पुढें भागीरथीसंगम । उत्तमोत्तम देखिला ॥५७॥ मानससरोवरीं जन्मली । यालागीं शरयू नाम पावली । अयोध्यानगरीं रूढ झाली । संगमा आली शरयू गंगेच्या ॥५८॥ देखोनि संगमदर्शन । साष्टांग केले नमन । स्नान संध्या जप ध्यान । मंत्रावर्तनप्रयोगें ॥५९॥ तये संगमासंगतीं । राम राहविला एक रातीं । प्रभात जालिया परतीराप्रती । जाणें निश्चितीं नेमिलें ॥६०॥

पहाटे नावेतून पैलतीराला जातात : मग प्रात:काली उठोन । नावेसीं रामलक्ष्मण । विश्वमित्र बैसवोनी जाण । घेवोनि आपण परतीरां गेला ॥६१॥ परतीरींचे विधान । केले स्नान संध्या जप ध्यान । तीरीं वनाचें विपरीत भान । रघुनंदन स्वयें देखें ॥६२॥

ताटिका राक्षसीच्या भयंकर त्रासाची कल्पना : उग्र पक्ष्यांची चावटी । क्रूर श्वापदाची दाटी । दिवाभीताची[4] घुंघाटी । शिवा[5] भुंकत भयानक ॥६३॥ भृगीझुंगीचे झणत्कार । वनीं वाजत भयंकर । राम पुसे हें वन कां घोर । ऋषि प्रत्युत्तर समूळ सांगे ॥६४॥ भयानक भासे वन । तेथें आहे ताटिकाभवन[6] । ते राक्षसी अति दारुण । प्राणिगणभक्षक ॥६५॥ तिचेनि वन हें उद्वस[7] । मालव केशिक कारूष । हे क्षणार्धें देश केले ओस । अति दुर्धर कर्कश राक्षसी ॥६६॥ दशदिशा मार्ग रोधून[8] । तिचे भेणे वागों न शके कोणी जन । तेणें मार्गें आपण । सर्वथा गमन न करावें ॥६७॥ येथोनि अर्ध योजन । आहे ताटिकेचे भवन । ती मार्गी करील प्राणरण । सर्वथा गमन न करावें ॥६८॥ राम म्हणे ऐसी कैंची । कोठोनि आली हे कोणाची । येवढी शक्ति तिला कैंची । ऋषि तियेची कथा सांगे ॥६९॥

ताटिकावृत्तांत : सुकेतु यक्ष अति पावन । त्यासी नव्हतें संतान । तेणें करोनि अनुष्ठान । ब्रह्मा प्रसन्न स्वयें केला ॥७०॥ तो मागे पुत्रसंतान । ब्रह्मयाने दिधले कण्यारत्न । अनल्प-वीर्यकन्या जाण । कार्यकारण प्रवृत्तीचें ॥७१॥ तुज नव्हे पुत्रसंतती । सहस्रबळनागशक्ती[9] । कन्या होईल निश्चितीं । ब्रह्मा वरदोक्ती वदोनि गेला ॥७२॥ ते हे ताटिका कन्यारत्न । सुंदोपसुंद बंधु दोघे जण । त्यांत ज्येष्ठ सुंदेंसीं केले लग्न । अति शोभन समारंभें ॥७३॥ सुंदापासोनि गर्भसंभवु । मारीच आणि सुबाहु । ताटिकेच्या पोटीं दोघे भाऊ । जन्मोद्भवु पावले ॥७४॥ त्या उभय बाळकांची जाळी । लागली पित्याचे मूळीं । पित्याची बुद्धि ते काळीं । मरणोन्मेळीं बळावली ॥७५॥ सदोपसुंद महावीर । परम योद्धे अति दुर्धर । तिहीं पराभवोनि सुरवर । त्याचें अधिकार स्वयें घेतलें ॥७६॥

तिलोत्तमेची कथा : त्याचा करावया वधू । विधाता रची विचित्र बोधू[10] । तिलोत्तमा सुंदर वधू । दोघे बंधू देखती ॥७७॥ ती देखतांचि सुंदर । दोघे उठिले सत्वर । तिच्या

---

शब्दार्थ - १. मंत्रसिद्ध, २. रीती, ३. गुरुआज्ञेला जीवाला पाहून घेतले, ४. घुबडांची, ५. कोल्हा, ६. ताटिकेचे घर, ७. ओसांड, ८. रोखून, अडवून, ९. हजारो बलवान् हत्तींच्या शक्तीची, १०. युक्ती.

वरणीं[1] अति तप्तर । तत्कामीं दुर्धर सकामी ॥७८॥ कनिष्ठ म्हणे ज्येष्ठासी । भावजयी मानीं तूं इसी । येरू म्हणे ज्येष्ठपत्नीऐसी । निश्चयेसीं तूं मानीं ॥७९॥ कनिष्ठाचे लहे । ज्येष्ठे पाळावे सोहळे । भावजयी मानीं ये वेल्हाळे । कृपामेळें कृपाळुवा ॥८०॥ ज्येष्ठआज्ञेची थोरी । कनिष्ठें मानावी शिरीं । हे ज्येष्ठपत्नी खरी । निजनिर्धारीं मानावी ॥८१॥ कनिष्ठे कामिली[2] जी कांता । ती भावजयी मानीं दुहिता । ज्येष्ठपत्नी ते तुज माता । तुवां तत्वतां मानावी ॥८२॥ ऐसिया करितां विवादा[3] । दोघे दुर्धर चढले क्रोधा । परस्परें घेवोनि गदा । निर्वाणयुद्धा प्रवर्तले ॥८३॥ दोघे युद्धीं अति दुर्धर । दोघे गदाविंदान[4] अति चतुर । अति मांडिला निकुर[5] । येरयेरां नाटोपती ॥८४॥ कनिष्ठें कळालाघवांत । केला ज्येष्ठाचा घात । पडतां गदा क्षोभें हाणित । कनिष्ठाचा घात ज्येष्ठें केला ॥८५॥

स्त्रीकामाचा प्रभाव : बंधुबंधूच्या घाईं[6] । दोघे जण पडिले ठाईं । हे स्त्रीकामाची नवाई दृष्टिक्षेपें[7] पाहीं देहांत दोघां ॥८६॥ नाहीं स्त्रीशीं कामे एकांतू । नाही स्त्रियेसीं केला मातू । नाहीं स्त्रियेसी लाविला हातु । परी अपघातु स्त्रीदृष्टीं ॥८७॥ एवं स्त्रियासीं न व्हावी भेटी । स्त्रियांसी न करावी गोष्टी । स्त्रियांसी पाहतांच दृष्टीं । उठाउठीं[8] आत्मघात ॥८८॥ सखे आत्मबंधु दोनी । तिहीं स्त्री देखतां नयनीं । निजघातें निमाले रणीं । स्त्रीदर्शनीं अपघात ॥८९॥ स्त्रीदर्शनीं देहघात । स्त्रीस्पर्शनीं नरकावर्त[9] । एवं स्त्रियांची संगत । अति अनर्थ पुरुषांसी ॥९०॥ कथाकथनीं सुंदोपसुंद । हा कथेसी लागला संबंध । म्हणोनि केला अनुवाद । श्रोतीं जल्पानुवाद[10] न म्हणावा ॥९१॥ स्त्रीसंगपासीं अति अनर्थ । हो बोलिलो परमार्थ । पुढील कथेचा भयचकित । ताटका तदर्थ या वना आली ॥९२॥

ताटिका राक्षसी का झाली? : मग बोले रघुनंदन । तीस कां आले राक्षसपण । तेविषयींचे निरूपण[11] । ऋषि संपूर्ण सांगतु[11] ॥९४॥ अगस्तीच्या आश्रमासी । ताटका वसे वनवासीं । घेउनि दोघां पुत्रांसी । ती परदेशीं विचरत ॥९५॥ ते नागायुतनिजशक्ती[12] । त्या बळाची अंगीं मस्ती । तेणें बळें ते दुर्मती । अगस्तीप्रती ढळूं गेली ॥९६॥ पुत्रांसमवेत आपण । विक्राळ करोनियां वंदन । अगस्तीस छळितां जाण । तेणें दारुण शाप दिधला ॥९७॥ विक्राळ करोनि वदनासी । ते तूं मज दहूं आलीसी । तें तूं सपुत्र राक्षसी । विक्राळ देहासीं विटंक[13] होसी ॥९८॥ ते हे अगस्तिशापदग्ध । राक्षसी अति विरुद्ध । प्राणिगणां करी बाध । मार्गनिरोध[14] केला असे ॥९९॥ जे मार्गीं असे ते राक्षसी । मे मार्गी जातां नये आम्हांसी । ऐसें ऐकतां ऋषिवाक्यासी । हासें रामासी पैं आलें ॥१००॥ स्त्रीव्यक्ति ताटिकाभणें[15] । जें करावें पलायन । तैं तुमच्या यागीं संरक्षण । केंवी आपण करावें ॥१॥ आज्ञा ऐसी स्वामीनाथा । राक्षसी वधीन मी आतां । ऐसें विश्वामित्रें ऐकतां । उल्हासें तत्वता आलिंगी ॥२॥ तुझा पहावया पुरुषार्थ । म्यां सूचिला मार्ग भयार्थ । तंव तूं निधडा रघुनाथ । निर्भयार्थ निजयोद्धा[16] ॥३॥ इसीं मारावें रघुनाथा । स्त्री मारूं नये शास्त्रार्था । दुष्टदमनीं हें वाक्य वृथा । इसीं सर्वथा मारावें ॥४॥ स्वामी करूं नये गुरुअवज्ञा । हे सकळशास्त्रप्रतिज्ञा । वसिष्ठदशरथांची आज्ञा । तुझी अवज्ञा न करावी ॥५॥ सकळ शास्त्रार्थ आपण । गुरुचरणां येती शरण । गुरूंचे अपार महिमान । अन्यथा कोण करूं शके ॥६॥

ताटिकेचा वध : ऐसें बोलोनि रघुनंदन । नमूनियां सद्गुरूचरण । चाप सज्जोनियां जाण । साटोपें ठाण[17] मांडिलें ॥७॥ ते काळीं श्रीरामस्वरूप । पाहातां काळासी सुटे कंप । वीर्यधैर्याचा

---

शब्दार्थ - १. बायको म्हणून स्वीकारण्यास, २. इच्छिली, ३. भांडण, ४. गदायुद्धकौशल्यामध्ये, ५. आवेश, ६. धावांनी, ७. फक्त कामदृष्टी ठेवल्याने, ८. त्वरित, ९. नरकरूप भोवरा, १०. अप्रस्तुत पाल्हाळ, ११. कथन करिता झाला, १२. दहा हजार हत्तींच्या शक्तीची, १३. प्रचंड, १४. रस्ता आडवणे, १५. ताटिकेच्या भयाने, १६. जातिवंत योद्धा, १७. अचळ उभा राहिला. अध्याय - दहहजार

साटोप[1] । परम प्रताप युद्धाचा ॥८॥ करिता धनुष्यीं टणत्कार । दुमदुमिले मेरुमांदार । खळबळले सप्त सगर । पाताळीं विखार[2] खळबळिले ॥९॥ धनुष्यनादें कांपे सृष्टी । न्याहा[3] उठला वैकुंठीं । ध्यानीं दचकला धूर्जटी । हडबड मोठी सुरवरां ॥११०॥ नांदे कोंदलें अंबर । दिशा जाल्या नादाकार । तेणें तटिकेचे जिव्हार[4] । कांपे थरथरा सनादें ॥११॥ तेणें गजबजुनी उठी । दोघे कुमार देखे दृष्टी । गिळावया आवळी[5] चाटी । सक्रोध उठी साटोपें ॥१२॥ विकट[6] देखोनियां हाक । विक्राळ पसरोनियां मुख । धांविन्नली श्रीरामासन्मुख । येरू तो निःशंक तद्वधार्थी ॥१३॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणा । पाहें भ्यासुर राक्षसी पूर्णा । देखतां प्राणी सांडिती प्राणा । इजसमोर कोणा न राहवे ॥१४॥ आतां पाहें माझें विंदान[7] । हस्तलाघवी अनुसंधान । एके घाई घेईन प्राण । म्हणोनि बाण सोडिला ॥१५॥ कनाडी ओढितां[8] आपण । आकर्षिला ताटिकेचा प्राण । हृदयीं आदळला बाण । जिव्हारीं पूर्ण भेदला ॥१६॥ बाणाच्या सबळ मेळीं । ताटिका देवोनि आरोळी । नेटें आदळली भूतळीं । न्याहा पाताळीं ऊठिला ॥१७॥ ताटिकेचें निजशरीरभारें । दुमदुमिलीं गिरीकंदरें । डळमळी मेरुशिखरें । भयें वनचरें मूर्च्छागत ॥१८॥ तळीं पाषाण जाले रांगोळी । वृक्ष उपडिले समूळीं । पक्षीं भ्रमती अंतराळीं । बैसलीं टाळीं दिग्गजांची ॥१९॥ ताटिकापातें भूकंप होत । समुद्रजळ उंचबळत । नरनारी हाहाभूत । असुर कांपत थरथरां ॥१२०॥ तिचे छेदिले त्रिविध ताप । छेदिले संकल्पविकल्प । छेदोनियां पुण्यपाप । विविकल्प मारिली ॥२१॥ छेदिला देहेंसी अभिमान । जीवपणऐसीं जीवबंधन । समूळ छेदोनि मीपण । ताटिका संपूर्ण मारिली ॥२२॥

त्रैलोक्यात सर्वांनाच आनंद : ताटिका पंडतांचि सृष्टीं । देवांची कोट्यानुकोटी । विमाने दाटली दाटीं । पुष्पवृष्टी तिहीं केली ॥२३॥ निशाणें[9] त्राहाटिलीं सुरवरीं । शंख दुंदुभि निशाण भेरी । गगन गर्जे जयजयकारीं । कीर्ति सुरवरीं वानिजे ॥२४॥ योगी छेदी निजकल्पना । तेणें सुख होय जीवा मना । ताटिका निर्दाळितांचि जाणा । सुख त्रिभुवना श्रीरामें ॥२५॥ भक्त निर्दाळी अशंका । तेणं तो पावोनि निजात्मसुखा । तेंवि वधिताचि ताटिका । सकळ लोकां आल्हाद ॥२६॥ विश्वामित्राचे निजगुण । अमरेंद्र वानी आपण । तुझेनि धर्में जाण । दुष्टनिर्दळण श्रीरामें ॥२७॥ ताटिका वधिली तत्काळीं । कौशिक नाचे आनंदमेळीं । श्रीरामाते जीवें ओवाळी । पिटिली टाळी ऋषिवृंदें ॥२८॥ इंद्र सांगे विश्वामित्रासी । अस्त्रविद्या द्यावी श्रीरामासी । हा साह्य सुरकार्यासी । तुमच्याही यागासी सिद्ध्यर्थ ॥२९॥ श्रीरामासारिखें पात्र । यासी सांगावें सच्छास्त्र । विद्या सांगावी सबीजमंत्र । तुवां विश्वामित्रगुरुवर्या ॥१३०॥ ऐकोनि देवांचे वचन । विश्वामित्र संतोषोन । श्रीराम दे आलिंगन । करी निंबलोण[10] सर्वस्वें ॥३१॥ तो म्हणे ताटिका वधितां येथ । सुरवरां सुख जालें अपरिमित । मार्गस्थां मार्ग निर्मुक्त । हा प्रताप समर्थ श्रीरामाचा ॥३२॥ हें रघुनाथाचें प्रथमचरित्र । लोकत्रयीं अति विख्यात । पुढारीं कथा परम अद्भुत । श्रोतीं सावचित्त परिसावी ॥३३॥ जे कथेचेनि अवधानें । जन्ममरणांचे उठे धरणें । विषयांचे खत लाटणें । गुढी उभवणें वैकुंठी ॥३४॥ वैकुंठींचे मुक्तवासी तेहि येती रामकथेसी । कथेचि महिमा आहे ऐसी । कथा सर्वांसी प्रियकर ॥३५॥ एकाजनार्दना शरण । जालें ताटकानिर्दळण । पुढें धनुर्विद्याअस्त्रग्रहण । यज्ञसंरक्षण ऋषींचे ॥३६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां ताटिकानिर्दलनं नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥ ओंव्या ॥१३६॥

---

शब्दार्थ – १. नेट, २. सर्प, ३. प्रतिध्वनी, ४. अंतःकरण, ५. जिभोळ्या, ६. भयंकर, ७. कुलता, ८. कानापर्यंत, ९. नगारे, १०. कुरवंडी.

# अध्याय तेरावा

## बाहूचा वध

विश्वामित्र उवाच-

एह्येहि रजनीं राम वसाम शुभदर्शन । अयं सिद्धाश्रमो नाम त्वत्प्रसादाद्भविष्यति ॥१॥

सिद्धाश्रमात मुक्काम : विश्वामित्र म्हणे रामासी । सिद्धाश्रम नाम यासी । येथे राहावें आजिचे निशीं । सिद्धाश्रमासी निजसिद्धी ॥१॥ आम्ही तुम्ही केलिया वस्ती । या सिद्धाश्रमाची सिद्ध ख्याती । विस्तारेल त्रिजगतीं । मम आश्रमाप्रति प्रभाते[1] गमन ॥२॥

अस्त्र विद्याग्रहण : येथे सुखें निशा क्रमून । प्रभाते स्नानसंध्या करून । विश्वामित्र म्हणे आपण । अस्त्रग्रहण करीं रामा ॥३॥ वसिष्ठाज्ञेचा निर्धारू । अनुविद्येसी तूं सद्गुरू । तदर्थीं आल्हाद थोरू । श्रद्धासादरू रघुनाथ ॥४॥ वंदोनि सद्गुरूचरण । कृतांजलि[2] रामलक्ष्मण । त्यासीं विश्वामित्र आपण । अस्त्रप्रदान प्रारंभी ॥५॥ तो म्हणे हें अस्त्राभिग्रहण । त्रिशुद्धी व्हावें सावधान । सबीजमंत्राचें मंत्रोद्धारण । प्रेरणावरण[3] अस्त्रांचें ॥६॥ अस्त्र सोडिलें तत्काळ जाय । कार्य साधूनि हातासी येय । ऐसीं बीजें निःसंदेह । ऋषि सांगताहे सवर्म ॥७॥

अस्त्रांची यादी : पन्नगास्त्र गरूडास्त्र । अग्न्यस्त्र पर्जन्यास्त्र । वायव्यास्त्र पर्वतास्त्र । वज्रास्त्र दुर्धरत्वें ॥८॥ सोमास्त्र हिमास्त्र । क्रोधास्त्र नंदिकास्त्र । गंधवास्त्र आदित्यास्त्र । हयशिरोस्त्र दारुण ॥९॥ वीरघ्नास्त्र विरोधास्त्र । दुर्मनास्त्र सर्पघ्नास्त्र । घोरास्त्र अधोरास्त्र । घोरघोरास्त्र अतितापी ॥१०॥ संतापास्त्र अतितापास्त्र । घोषणास्त्र दानवास्त्र । पिशाचिकास्त्र पिपीलिकास्त्र । विद्या-धरास्त्र मारक ॥११॥ वृकास्त्रे[4] जंबुकास्त्र । जंबुकास्त्र शुचिकास्त्र । मानवास्त्र वृश्चिकास्त्र । त्वष्ट्रस्त्र तडित्प्राये[5] ॥१२॥ कंकाळास्त्र कालिकास्त्र । सूचिकास्त्र विषूचिकास्त्र । चंडास्त्र प्रचंडास्त्र । वितंडास्त्र दाहक ॥१३॥ संवर्त्तकास्त्र शलभास्त्र । विखंडास्त्र दंडनास्त्र । शीतकास्त्र वातास्त्र । वंशिकास्त्र विध्वंसी ॥१४॥ मायास्त्र मोहनास्त्र । तानास्त्र घातनास्त्र । मातंगी-दहनास्त्र । ब्रह्मकपालास्त्र रुधिराशी[6] ॥१५॥ भीमास्त्र भयानकास्त्र । शृंगास्त्र भृंगास्त्र । क्रूरास्त्र भैरवास्त्र । करालास्त्र उग्रत्वें ॥१६॥ वारूणास्त्र दारुणास्त्र । काळरुद्रास्त्र कार्तिकेयास्त्र । कपालास्त्र भद्रास्त्र । वामनास्त्र विघाती ॥१७॥ संकर्षणास्त्र नारायणास्त्र । शंकरास्त्र नृसिंहास्त्र । वामनास्त्र प्रद्युम्नास्त्र । मदनाशास्त्र प्रतापी ॥१८॥ ईषीकास्त्र तृणशलाका । दाटुगी[7] जिणोनि अस्त्रें अनेका । पाशुपताची महिमा देखा । तिहीं लोकां अनिवार ॥१९॥ ब्रह्मशिरास्त्राचा मंत्र । प्रेरिलिया छेदी चराचर । याचा ऐसा असे विचार । यालागीं हे अस्त्र राखिजे जतन ॥२०॥ मांडल्याही निर्वाण । या अस्त्राचें प्रेरण । सर्वथा न करिती विचक्षण । परम दारुण अनिवार ॥२१॥ हें अस्त्र जो पाळूं जाणे । सकळां अस्त्रा सामर्थ्य येणें । यालागीं हें अस्त्र शहाणे । अति यत्नें पाळिती ॥२२॥ जाली अस्त्रांची अवधी । आतां सांगेन आतां सांगेन शस्त्रविधी । जे स्मरतांचि त्रिशुद्धी[8] । युद्धसमयीं येती स्वयें ॥२३॥ वायुचक्र विष्णुचक्र । कूर्मचक्र । कूर्मचक्र काळचक्र । नक्रचक्र अतिवक्र । अति दुर्धर कंदनाकार ॥२४॥ शूळ त्रिशूळ महाशूळ पाहें । घाईं खोचीं चारी देहें । तया समोर कोण राहे । धाकें कांपताहे कळिकाळ ॥२५॥ कौमोदकी शिवोदकी । दोन्ही गदा अलौकिकी । मोहममतेच्या छेदकी । तिहीं लोकीं अति धाक ॥२६॥ दोनी खड्ग अति खाच । एक जीवाचा छेदक । दुजा कल्पनेचा घातक । यासी लोकालोक कांपती ॥२७॥ शिवशक्ती विष्णुशक्ती । अनादि आदिशक्ती । संदेहें लिंगदेह छेदिती । याचिका दीप्तीं पळे कथिकाळ ॥२८॥

धनुर्विद्येचा प्रभाव : टणत्कारें ओढितां कानाडी[9] । नादें निमती[10] राक्षसकोडी । माया सहकुटुंब

---

शब्दार्थ - १. सकाळी, २. हात जोडून, ३. सोडणे आणि माघारे, ४. लांडग्याचे अस्त्र, ५. विजेसारखे, ६. रक्ताचे प्राशन करणारे, ७. प्रचंड, ८. खरोखर, ९. धनुष्याची दोरी, १०. मरतात.

प्राण सांडी । हे धनुविद्या गाढी दृघ धरीं ॥२९॥ निजतेजें तिखट सदा । अशेष आशेच्या करी छेदा । तो दिव्य बाण हे प्रबुद्धा । तूणीरबद्धो[1] निर्बंधु ॥३०॥

मल्लविद्या : जालिया शस्त्रास्त्रविधी । मल्लविद्याविंदानसिद्धी । गुरुकृपा उपजे त्रिशुद्धी । कृपानिधी सच्छिष्या ॥३१॥ उपदेशितां विश्वामित्रें । धनुर्विद्या शस्त्रास्त्रें । ते विद्या श्रीरामचंद्रें निमिषमात्रें निजबोधिली ॥३२॥

मंत्रदेवता श्रीरामसेवेची घोषणा करतात : मंत्राच्या मंत्रशक्ति तत्वतां । आणि मंत्रमूर्ति समस्ता । स्वयें वंदिती रघुनाथा । आमची समर्थता तुझेनी ॥३३॥ आमचा स्वभाव छेदक भूर्ती । ते छेदकता तुझे हातीं । मरत्या मारित्या अमृतप्राप्ती । ऋषि वंदिती पावनत्वें ॥३४॥ तूं अधर्मातें निर्दाहिसी । स्वधर्मातें प्रतिपाळिसी । तेचि कार्ति पैं आम्हांसी । तुझेनि हस्तेंसीं पावन ॥३५॥ तुवां आम्हांसी धरितां हातीं । आम्ही पावन तुझिया ख्यातीं । तुझिया युद्धाची कीर्ती । कवि वानिती पुराणीं ॥३६॥ आमचें कर्म भूतघातीं । घातामाजीं तूं देसी मुक्ती । तेणें आमची पावन कीर्ती । स्वयें वंदिती द्विज देव ॥३७॥ ऐसी करोनि स्तुतिवादना । रामचरणीं लागल्या जाणा । मग करूनियां प्रदक्षिणा । रामहृदयीं जाणा प्रवेशल्या ॥३८॥ शस्त्रदेवता अहर्निशीं । जोडोनि हात ठेल्या[2] श्रीरामचरणांसी । घोकणी चिंतन न लगे त्यासी । अनासायीं प्राप्त सर्वज्ञा ॥३९॥ यालागीं संग्रामासी । जें जे शस्त्र पाहिजे त्यासी । तें तें येतें हातापासीं । शत्रुघातासी स्वभावें ॥४०॥ शस्त्रास्त्रांसी श्रीरामीक्ती । रामहृदयीं शस्त्राची वस्ती । ऐसिया अभिनवा गतीं । संग्रामस्थिती श्रीरामीं ॥४१॥ एवं श्रीरामसौमित्रां । उपदेशितां विश्वामित्रा । उल्लास जाला शस्त्रास्त्रां । निशाचरां वधावया ॥४२॥

श्रीराम विद्यासंपन्न झाल्यामुळे विश्वामित्रांना आनंद : ऋषीनें हात ठेवितां माथां । विद्या बाणली[3] रघुनाथा । तेणें उल्लास तत्वता । ऋषि स्वानंदता स्वयें नाचे ॥४३॥ विद्या बाणतां शिष्याचे पोटीं । गुरुसी आनंदाच्या कोटी । हे शाब्दिक न कळे गोष्टी । बोधकसवटी[4] अनुपम्य ॥४४॥ शाब्दिकाचें शब्दज्ञान । तेंचि सोलींव अज्ञान । तेंचि साधकां निजबंधन । रघुनंदन तैसा नव्हे ॥४५॥ रघुनाथ विद्याधिष्ठान[5] हे विश्वामित्रा कळली खूण । तेणं आनंदें बोले आपण । येथोनि प्रयाण करावें ॥४६॥

विश्वामित्रांच्या आश्रमात आगमन : ऐकोनि गुरूचें वचन । रथारूढ रामलक्ष्मण । उल्लासें करितां गमन । पुढें शोभायमान नव देखें ॥४७॥ राम म्हणे ऋषि निर्मळा । ही कोणाची शोभनशाळा । येरू म्हणे धननीळा । आश्रम सोज्ज्वळा पैं माझा ॥४८॥ आश्रमा आले रघुपती । आनंदल्या ऋषिपंक्ती । विश्वामित्रे धर्मस्थिती । रामा अति प्रीतीं पूजिलें ॥४९॥ आणोनि श्रीरामा सुभटा । पाचारोनी मुनिश्रेष्ठां । आदरें अग्निप्रतिष्ठा । केली स्वधर्मे पैं ॥५०॥ गर्ता वेदी[6] कुंड मंडप । विधियुक्त तोरें पताकारोप[7] । यालागीं मुख्य रघुनाथ यूप[8] । तो निजरूप यज्ञाचें ॥५१॥ अग्निप्रतिष्ठा[9] पूजन । परिसमूहन[10] परिस्तरण[11] । प्रणीतापात्रें[12] करोनि पूर्ण । इध्माविसर्जन[13] होमार्थ ॥५२॥ बर्हीचे[14] आस्तरण[15] । आज्यस्थालीसंस्थापन[16] । ज्वलनाज्य[17] आघारून[18] । होमप्राधान्य मंत्रोक्तीं ॥५३॥

राक्षसांकडून यज्ञविध्वंसासंबंधी श्रीरामाचा प्रश्न : ॐकारवषट्कारेंसीं करिती यज्ञ । ऋषींस पुरे रघुनंदन । राक्षस यज्ञविध्वंसन । कोठोनि येवोन ते करिती ॥५४॥ ऐसें पुसतां रघुनाथा । उल्लास मुनिवरां समस्तां । कौशिकें आश्वासोनि माथा । राक्षसकथा स्वयें सांगे ॥५५॥ आरंभापासोनि साहावे रातीं । अलक्षलक्षें राक्षस येती । रिघोनियां यागाप्रती विध्वंसिती

---

शब्दार्थ - १. भाता बांधून सिद्ध अशा, २. राहिल्या, ३. बिंबली, ठसवली, ४. बोधाची कसोटी, ५. विद्येचे स्थान, ६. यज्ञातील कुंडाजवळील ओटा, ७. ध्वजा उभारणे, ८. स्तंभ, ९. अग्निस्थापना, १०. अग्नीच्या आजूबाजूस पाणी शिंपडणे, ११. चारी बाजूस दर्भ पसरणे, १२. यज्ञपात्रे, १३. समिधा सोडून ठेवणे, १४. दर्भाचे, १५. पसरणे, १६. तुपाचे भांडे ठेवणे, १७. अग्नी पेटविण्यास घालावे लागणारे तूप, १८. आघार आहुती घालून.

दुर्धर ।।५६।। जो निर्विकार निजनेटासीं । सहा दिवस अहर्निशीं । सावध राहे निद्रेंसीं । राक्षस त्यासी वध्य होती ।।५७।। ऐसें ऐकतां गुरुवचन । श्रीराम नित्य सावधान । वेगें घेवोनि धनुष्य-बाण । राहिला आपण यज्ञद्वारीं ।।५८।। कर्मयागीं कर्ता विश्वामित्र । क्षात्रधर्मयागीं रघुवीर । दोहीं यागांचा विचार । श्रोती साचार परिसावा ।।५९।। कर्मयागीं कुंडसाधन । क्षात्रयागीं रणरंगण । कर्मयागीं वेदविधान । अपलायन[१] क्षात्रयागीं ।।६०।। ऋषियागीं ब्रह्मा श्रेष्ठ । रणयागीं सत्ववरिष्ठ । यज्ञयागीं कर्मखटपट । तेथे खणखणाट शस्त्रांचा ।।६१।। येथें स्रुक्[२] स्रुवा[३] परिमार्जन । तेथे धनुष्यीं लाविले बाण । बाणांचे परिस्तरण । परिसमूहन धैर्याचें ।।६२।। कर्मयागीं अग्निस्थापन । येथें काळानळहुताशन । तेथें स्रुवेनें होमिती अन्न । येथें मांसावदन बाणाग्रे ।।६३।। ऋषियागीं वसोर्धारा[४] । येथे प्रवाहो रुधिरा । तेथें ॐकारवषट्कारा । येथें हाहाकार वीरांचे ।।६४।। कर्मयागीं ज्वाला उद्भट । येथें शस्त्रांचा खणखणाट । यागीं धूम्र निघे अचाट । येथे स्वेद श्रम कष्ट वीरांचे ।।६५।। यागीं वाढल्या हुताशन । पृषदाज्यें[५] अभिषिंचन । राक्षस वाढल्या दारूण । अस्त्रीं सिंचन तयांसी ।।६६।। यागीं सदीप बलिदान । येथें जीवबळि संदीप्तज्ञान । बळि नेती सलोभ हीन । येथें जीवपण देहेलोभें ।।६७।। श्रीरामासी विमुख होऊन । जे युद्धीं करिती पलायन । त्यांचे न तुटे देहबंधन । जीवबळिभक्षण अध:पात ।।६८।। या यागीं पूर्णाहुति नारिकेळें । येथें पूर्णाहूति शिसाळें[६] । तेथें प्रदक्षिणा मंत्रमेळें । येथें रणकल्लोळें प्रदक्षिणा ।।६९।। कर्मयागीं दक्षिणा धन । येथें दक्षिणा निजपद पूर्ण । तेथें अभिषिंचितां ब्राह्मण । येथ देवगणपुष्पवृष्टि ।।७०।। या यागीं श्रेय संपाद्य विश्वामित्रा । संग्रामश्रेय श्रीरामचंद्रा । श्रेयें उल्लास स्वगोत्रा । येथें चराचरा उल्लास ।।७१।। कर्मयागीं ब्राह्मणभोजन रणयागीं भूतसंतर्पण । दोनी यागीं समसमान । सिद्धी संपूर्ण रघुवीरें ।।७२।। यज्ञांती अग्निविसर्जन । तैसें न करी रघुनंदन । पूर्ण द्यावया भोजन । नवें निमंत्रण काळानळा ।।७३।। ताटिकावधें पात्रप्रोक्षण । चित्राहुति सुबाहु संपूर्ण । त्रिशिरा आणि खर दूषण । प्रथम जाण प्राणाहुती ।।७४।। कढीभात तो कुंभकर्ण । इंद्रजित पक्वान्नें पूर्ण । रावण तो दध्योदन[७] । उत्तरापोशन रणत्याग ।।७५।। प्रधान आणि राक्षसगण । हे भोजनीं शाखा आणि लवण । अखयादि पुत्र पूर्ण । ते लोणचीं जाण सर्वसवें ।।७६।। इतुकें जलिया संपूर्ण । काळानळा तृप्तिभोजन । हें द्यावया रघुनंदन । सावधान युद्धार्थीं ।।७७।।

श्रोत्यांना विनंती : विश्वामित्रयज्ञरक्षण- । कथा सांडोनि रामायण । मध्येंचि केले व्यर्थ कथन । तें श्रोतीं संपूर्ण क्षमा कीजे ।।७८।। मी तंव संतांचे लळिवाड[८] । माझ्या बोलांचे त्यांसी कोड । यालागीं माझी बडबड । लागो गोड साधूंसी ।।७९।। साधूंचें मी तान्हें बाळक । अगणुपणें समूळ मूर्ख । रामकथा वदे ज्याचें मुख । हें कृपापीयूष साधूंचें ।।८०।। तव संत म्हणती नवलाव । उभययाग अभिप्राव । शुद्ध साधिला आत्मानुभव । अविरुद्ध भाव वेदोक्तीं ।।८१।। श्रीरामीं प्रेम गहन । हें निरूपणीं कळलें चिन्ह । आतां चालवीं रामायण । मूळनिरूपण ग्रंथार्थ ।।८२।। ऐकोनि साधूंचा अनुवाद । कवित्वा जाला परम आल्हाद । एकाजनार्दनीं बोध । कथासंबंध अवधारा ।।८३।।

श्रीरामांच्या पहाऱ्यामुळे राक्षसांना संधी मिळेना : विश्वामित्रयज्ञरक्षण । करावया श्रीराम स्वयें सावधान । रिघों न शक्ती राक्षणगण । सुबाहु स्वयें आपण आला ।।८४।। यज्ञद्वारीं श्रीरघुपती । तेथें राक्षसांची न चले गती । अंधारी छळावया येती । तंव श्रीराममूर्ति सावधान ।।८५।। दिवसा करावया छळण । तेथे श्रीराम सावधान । स्वयें सुबाहु भोंवे आपण । तरी

शब्दार्थ - १. न पळणे, २. यज्ञातील लाकडांच्या पळ्या, ३. स्वच्छ करणे, ४. तुपाची धार, ५. दधियुक्त घृताने, ६. मस्तके, ७. दहीभात, ८. आवडता.

रघुनंदन छळेना[१] ॥८६॥ अंधराचे निजतेज । स्वयें श्रीरामाच सहज । दिवसाचे निजबीज । दशरथात्मज निजांगे ॥८७॥ यज्ञरक्षक रघुनाथ । न चले दळाचें छळमत । हा बाळपणीं प्रतापवंत । ठेला तटस्थ सुबाहु ॥८८॥ दावूं दूर्धरत्वें[२] दरारा[३] । तंव श्रीराम नेघे भेदरा[४] । झांपडें पडिलें निशाचरां । सर्वथा अध्वरां[५] शिरों नेदी ॥८९॥ श्रीराम नित्य सावधान । सर्वांगदेखणा संपूर्ण । सुबाहूचें तळमळी मन । ऋषीनें संपूर्ण गांजिलों ॥९०॥ आतां संग्राम करूं सदृढ । घेऊं ताटिकेचा सूड । म्हणोनि असुर पडिपाड । गगनीं गडगड गर्जत ॥९१॥ वर्षती रुधिराचिया धारा । भयें भेडसावीत द्विजवरां । सांभाळीं म्हणत रघुवारा । आला सामोरा सुबाहु ॥९२॥

**राक्षसांचा हल्ला. श्रीरामांकडून सुबाहूचा नाश :** हांसे आले रघुवीरा । बाणीं त्रासिला सुबाहु पुरा । तंव मारीच धांविन्नला कैवारा । तेणें रामचंद्रां हाकिलें ॥९३॥ बाबरझोटिया समस्तक । घोर नादें दिधली हाक । विक्राळ पसरोनिया मुख । श्रीरामसन्मुख धांविन्नला ॥९४॥ ऐकतां राक्षस आरोळी । भयें द्विज पडिले भूतळीं । एकांच्या बैसल्या दांतखिळी । एक ते चळचळीं कांपत ॥९५॥ एकांची धोत्रें गहती । एक ते धोत्रांत मुतती । एकां अधोवात सस्ती । एक करिती महाशब्द ॥९६॥ एक आरडती ओरडती । एक दीर्घस्वरें रउती । एक उघडे पडती । एक चरफडती अति धाकें ॥९७॥ एकांचे खुटखुटती दांत । एकांचे फुटलें ओंठ । एकांचे भयें फुगले पोट । अति संकट ब्राह्मणां ॥९८॥ राम म्हणे लक्ष्मणासी । वेगीं नाभिकार[६] दे द्विजांसी । थोर होती कासाविसी । मी राक्षसांसी निवटीन[७] ॥९९॥ तंव समुदायें निशाचर । करीत आले हाहाकार । विक्राळ दुर्मद अति दुर्धर । अति भयंकर संग्रामीं ॥१००॥ कातिया त्रिशूभ तोमर । गदा मुद्गल चंड चक्र । बाण खड्गें लहुडी थोर । शस्त्रभार सूटले ॥१॥ महाशस्त्रांचा लखलखाट । थोर खड्गांचा खणखणाट । बाण सुटती सणसणाट । घाय उद्भट हाणिती ॥२॥ राहें साहें वीर शूर । घायें निर्बळ केले असुर । पळूं नको थरीं धीर । क्रोधें वीर गर्जती ॥३॥ तंव रामे सोडिला बाण । सकळ शस्त्रें केली चूर्ण । तिळप्राय केले वोढण[८] । बळसंपन्न रघुवीरें ॥४॥ निवारावयास रामबाण । शस्त्रें सोडितां ती होती चूर्ण । वीर खोचलें दारूण । सुबाहु पूर्ण क्षोभला ॥५॥ मग हातीं वसवोनि[९] गदा । सुबाहु धांविन्नला मल्लयुद्धा । तंव श्रीराम नित्यसावध । राक्षसद्वंद्वातें कळलें ॥६॥ सुबाहूची गदा केली पीठ । मारीचाचा मुद्गल केला कूट । शूळ त्रिशूळ अति तिखट । ते करी सपाट श्रीराम ॥७॥

**बाणपिसाऱ्याने मारीचाला शतयोजने दूर उडविले :** बाणी योजिले अग्निअस्त्रा । घायें सुबाहु केला पुरा । मारीच पळविला माघारा । त्यासी पिसारा लागला ॥८॥ पिसारा लागला ब्रह्मांडी । तेणें त्यासी आली भोंवंडी । हातपायां वळली मुरकुंडी । सुटल्या तोंडी रुधिरधारा ॥९॥ बाणपिसारियाचा पवन । मारीचास उडवी जैसें तृण । वाहुटळीमाजी भोंवे पान । तेंवी परिभ्रमण आकाशीं ॥११०॥ बाणपिसारियाचा वारा । मारीच उडविला अंबरा । शतयोजन समुद्रतीरा । तेथें निशाचरा टाकिलें ॥११॥ राम लक्ष्मणासी म्हणे आपण । मारीचास नाहीं लागला बाण । यालागीं त्याचा न वचे प्राण । पिसारें पूर्ण उडविला ॥१२॥ मारीचास मूर्च्छा उद्भट । वटारिले नेत्रवाट । घुरघुरीत वाजे कंठ । प्राणसंकट मांडलें ॥१३॥ मारीच दैवें जाला सावध । परी धाक घेतला सुबद्ध । पिसारियाचा येवढा बाध । मा सन्मुख युद्ध कोण साहे ॥१४॥ राम देखतांचि जीव जाय । त्याचे निर्वाणाचे घाय । देहवंत कोण साहे । महाभया भय श्रीराम ॥१५॥

**श्रीरामांच्या धाकाने मारीचाकडून आश्रमस्वीकार :** देखोनि श्रीरामाचे चरण । युद्धाभिमान गेला पळोन । संग्राम न करी आपण । वाहोनियां आण निजाश्रमीं शांत ॥१६॥ श्रीरामाचा

शब्दार्थ – १. फसत नाही, २. भयानक स्वरूपानें, ३. भीती, धसका, ४. भय, ५. यज्ञात, ६. अभय दे, ७. नाश करीन, ८. ढाल, ९. घेऊन.

निजबाण । सुबाहूचे निवटी मन । चित्त बुद्धि अभिमान । छेदूनि संपूर्ण मारिला ॥१७॥ येणें नेटें मारिला देख । जे मरणाचें नाठवे दुःख । पुढे जन्माचें न देखे मुख । ऐसा निःशेष मारिला ॥१८॥ मारीच-सुबाहूंचे अनेक सेवक । राक्षस जे आले अनेक । रोमं मारिलें एक एक । राक्षसातक श्रीराम ॥१९॥ राक्षसांची महाथेंडीं । आरमीं पडलीं मढीं । शिष्य धाकती बापुडीं । ही कोण काढी अति दीर्घ ॥१२०॥ त्या शिष्यांची सांकडी[1] । न लागतां अर्धघडी । श्रीरामें फेडिली रोकडी । घेवोनि भूतकोडी जगदंबा आली ॥२१॥

जगदंबा आणि विश्वामित्रऋषींनीं श्रीरामाचे केलेले अभिनंदन : औटकोटी[2] भूतावळी । सहित आली भद्रकाळी । आरती घेवोनि सोज्ज्वळी । स्वयें ओवाळी श्रीरामा ॥२२॥ येतां भूतांचा मेळा । प्रेतें नेलीं देखतां डोळां । आश्रम जाला अति सोज्ज्वळा । सडे रंगमाळा घातल्या भूर्ती ॥२३॥ ऋषि राक्षसभयें भयभीत । पडले होते पैं मूर्च्छित । ते लक्ष्मणें करूनि सावच्चित्त । शीघ्र स्नानार्थ पाठविलें ॥२४॥ वेगीं आले करूनि स्नान । आश्रम दिसे शोभायमान । बाप प्रतापी रघुनंदन । स्वानंदे स्तवन ऋषि करिती ॥२५॥ विजयी जाला रघुवीर । सुखी जाले ऋषीश्वर । विष्णू पूजिती सुरवर । तैसा रामचंद्र पूजिला ॥२६॥ रामप्रताप देखोनि दृष्टीं । विश्वामित्रा आनंदकोटी । श्रीरामाची पाठी थापटी । उल्लास सृष्टीं न समायें ॥२७॥ गुरुआज्ञा तुवां पाळिली । गुरुसेवा तुजचि फळली । गुरुची चिंता तुवा हरिली । गुरुपूजा केली यथार्थ ॥२८॥ तूं गुरुत्व सद्‌गुरूचें । तूं गुरुज्ञान निश्चयाचें । तूं निजबीज गुरुवाक्याचें । गुरुत्व साचें तुझेनी ॥२९॥ श्रीराम गुरुत्वाची गरिमा[3] । श्रीराम गुरुत्वाची महिमा । श्रीराम गुरुत्वाची सीमा । ब्रह्मत्व ब्रह्मा श्रीरामें ॥१३०॥ श्रीराम गुरुत्वाचें निजवीर्य[4] । श्रीराम गुरूचें निजधैर्य । श्रीराम गुरुत्वा गुरुवर्य । गुरुगांभीर्य श्रीराम ॥३१॥ श्रीराम गुरुत्वाचें निजतेज । श्रीराम गुरुत्वाचं निज बीज । श्रीराम गुरुवाचें गुह्य गुज । स्वानंदभोज[5] श्रीराम ॥३२॥ श्रीराम गुरूची निजमूर्ती । श्रीराम निश्चितीं गुरुगम्य[6] ॥३३॥ श्रीराम गुरुत्वा निजप्रताप । श्रीराम गुरूचें सद्रूप । श्रीराम स्वयें ब्रह्मरूप । चित्स्वरूप श्रीराम ॥३४॥ ऐसें श्रीरामाचें निजस्तवन । कौशिकें करोनि आपण । आनंदें दिधले आलिंगन । समाधान गुरुशिष्यां ॥३५॥

विजयप्राप्तीच्या आनंदामुळे विश्वामित्रांकडून दानधर्म : विश्वामित्र आनंदें निर्भर । द्विजा दे गौ सहस्रासहस्र । सुवर्णशुंगी रौप्यखूर । पृष्ठींस ताम्र कांस्यदोही ॥३६॥ गोपुच्छींची प्रवाळें लेवविली रत्नें मुक्ताफळें । ऐसीं विश्वामित्रें गोकुळे । देवोनि द्विजकुळें सुखी केलीं ॥३७॥ सुवर्णाचे संभार । दक्षिणांचे सहस्रासहस्र । याचक केले हर्षनिर्भर । मागते अभर कौशिक यागीं ॥३८॥ रामें निवटिले राक्षसगण । ऋषींचा सिद्धि पावला यज्ञ । जालें ब्राह्मणभोंजन । रघुनंदन निजवियी ॥३९॥ विजयी जाला रघुनाथ । पवाडा केला त्रैलोक्यांत । ऐकोनि रावण विस्मित । आनंद अद्‌भुत सुरवरांसी ॥४०॥ एकाजनार्दना शरण । जालें सुबाहुनिर्दळण । सिद्धि पावला गुरूचा यज्ञ । अहल्योद्धरण अवधारा ॥४१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां सुबाहुनिर्दलनं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥ ओंव्या ॥१४१॥ श्लोक ॥१॥ एवं ॥१४२॥

---

शब्दार्थ - १. संकट, २. साडेतीन कोटी, ३. थोरपणा, ४. मोठे बळ, ५. स्वानंदसुख, ६. गुरूकृपेनेच ओळखता येणारा, ७. परिपूर्ण, ८. संपन्न.

# अध्याय चौदावा

## अहल्योद्धार

एवमुक्ते तयोर्वाक्ये सर्व एव महर्षयः । विश्वामित्रं पुरस्कृत्य राघवं वाक्यमब्रुवन् ॥१॥
मैथिलस्य नरश्रेष्ठ जनकस्य भविष्यति । यज्ञः परमधर्मिष्ठो यास्यामस्तत्र वै वयम् ॥२॥
त्वं चापि नरशार्दूल सहास्माभिर्गमिष्यासि । अद्‌भुतं च धनूरत्नं तत्र त्वं द्रष्टुमर्हासि ॥३॥

जनकराजाकडून स्वयंवराचे आमंत्रण : ऋषिसभे प्रसन्नोन्मुख । बैसले वर्णिती रघुकुळटिळक । तंव जनकाचे दोघे सेवक । पत्र कुंकुमांकित घेवोनि आले ॥१॥ विश्वामित्रें निजयागार्थ । ऋषी मेळविले समस्त । स्वामीनें त्यांसमवेत । यावें यज्ञार्थ स्वयंवरा ॥२॥ तंव रामलक्ष्मणांलागुनी । कौशिक[1] बोलावी सन्मानोनी । दोघीं साष्टांग नमूनी । कर जोडोनी बोलत ॥३॥ आम्ही तुझे नित्यांकित । निजसेवक निश्चित । सिद्धी पावला यज्ञार्थ । पुढील कार्यार्थ सांगावा ॥४॥ स्वामी जे तूं आज्ञा देसी । तें कार्य करूं क्षणार्धेसीं । गुरुकृपेची महिमा ऐसी । सर्व कार्यासी निजसिद्धी ॥५॥ बाळपणीं धीर शूर । मारिले उद्भट निशाचर । परी गर्व न धरी रघुवीर । तेणें विश्वामित्र सुखी झाला ॥६॥ वीर्यधैर्येंसी ज्ञान प्रांजळें[2] । ऐसा निगर्वी शिष्य मिळे । तेणें गुरूसी सुखसोहळे । त्या सुखासी कांटाळें[3] असेचिना ॥७॥

विश्वामित्रांची श्रीरामांना मिथिलेला येण्याविषयी विनंती : ऐसा सुखावोनि विश्वामित्र । आलिंगिले श्रीरामसौमित्र । सांगे जनकाचे आलें मूळपत्र[4] । जाणें सत्वर मिथिलेसी ॥८॥ जनक मिथिलेचा नृपवर । धनुर्याग सीतास्वयंवर । तेथें मिनलें[5] सुरनर । तेणें ऋषीश्वर बोलाविले ॥९॥ देशोदेशींच्या भूपाळां । मूळ[6] पाठविलें सकळां । दशरथासी धाडिले मूळा । तो नयेचि विव्हळा श्रीरामविरहें ॥१०॥ आम्ही ऋषिवर्य समस्त । अवश्य जाऊं गा तेथ । तुम्हींही यावें आम्हांसमवेत । आज्ञा समर्थ म्हणे श्रीराम ॥११॥

श्रीरामांची अनुमती : गुरुआज्ञापरिपाळण । हें सकळ भाग्या निजभूषण । सकळ कल्याणाचें कल्याण । गुरुवचन शिष्यासी ॥१२॥ तुझेनि शिष्यत्वें माझी थोरी । तुवां अवश्य यावें तेथवरी । सकळ राजे सभेमाझारीं । तूं मुख्य मुखरण[7] होसील ॥१३॥

सर्वांचे मिथिलेला प्रयाण : ऐसें ऐकोनि गुरुवचन । सद्‌गुरुसमवेत आपण । रथारूढ रामलक्ष्मण। मिथिलेसी प्रयाण महोत्साहें ॥१४॥ रथारूढ रामचंद्र । अवघे करिती जयजयकार । ऋषीसमवेत रघुवीर । अति सत्वर निघाला ॥१५॥ मिथिलेंआरते[8] पंचयोजनीं । मुनि राहिले कुशोपवनीं । बैसल्या ऋषींचिया[9] श्रेणी । राम सुखासनीं उपविष्ट[10] ॥१६॥

मार्गातून जाताना एक ओसाड आश्रम लागतो : तेचि उपवनीं एके कोनी । श्रीराम आश्रम देखे नयनीं । वृक्ष खांकरले[11] फळीं पानीं । आश्रमी कोणी असेना ॥१७॥ ऐसें देखोनि रघुनाथ । पुसे ऋषींस वृत्तांत । म्हणे हें कां दिसे वन उपहत[12] । हा वृत्तांत सांगा मज ॥१८॥ येथें वस्ती नाहीं मनुष्यासी । पक्षीं वाळिलें[13] वृक्षांसी । आश्रमीं नाहीं मुंगी माशी । उपहती ऐसी कां दिसे ॥१९॥ ऐसें पुसतां श्रीरामासी । पूर्वकथा सांगे ऋषी । ये आश्रमीं अहल्येसीं । आश्रमवासी गौतम ॥२०॥ इंद्रें छळिलें अहल्येसी । गौतमें शापिलें दोहींसी । तैंपासोनिया आश्रमासी । वस्ती कोणासी असेना ॥२१॥

अहल्येविषयी श्रीरामाची जिज्ञासा : राम पुसे अहल्या ती कोण । इंद्रें छळावया काय कारण । हें समूळ मूळींचें कथन । कृपा करून सांगावें ॥२२॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । विश्वामित्र म्हणे आपण । अहल्येचें उद्धरण । प्रसंगें पूर्ण ओढवलें ॥२३॥

शब्दार्थ - १. विश्वामित्र, २. शुद्ध, ३. तुलना, ४. आमंत्रणपित्रका, ५. जमले, ६. निमंत्रण, ७. प्रमुख, ८. मिथिलेच्या पलीकडे, ९. पंक्ती, समुदाय, १०. बसलेला, ११. ओसाड, फळहीन झालेले, १२. तेजरहित, १३. त्यागिले, टाकले.

**तिचे सौंदर्यवर्णन :** त्रैलोक्यींचें बरवेपण । ब्रह्मयाने एकवटोनि आपण । स्वयें कन्या केली निर्माण । अहल्या जाण तीस नांव ॥२४॥ शरीर अत्यंत सुकुमार । खुपों शकती चंद्रकर[1] । पन्नगपद्मिणी[2] तीपुढें निबर[3] । निजांगें अरुवार[4] नभापरिस ॥२५॥ तिचें होतांचि स्पर्शन । मनआदि इंद्रियां गुदगुल्या पूर्ण । फिकें अमृताचें गोडपण । तिचे बरवेपण देखोनि ॥२६॥ देखोनि तिचिया मुखासी । अत्यंत सुख डोळ्यांसी । ते मुखीं जाले[5] क्षेत्रसंन्यासी । आन पहावयासी नावडे ॥२७॥ अत्यंत सौंदर्याची शोभा । चंद्र लोपे अंगप्रभा । देखोनि लावण्याचा गाभा । विवेकाचा उभा प्राण जाय ॥२८॥ तिसीं होतां डोळेभेटी । धैर्याची विरे गांठी । बरवेपणें अत्यंत लाठी[6] । देखिल्या दृष्टी उपडेना ॥२९॥ ऐसी अत्यंत सुंदर । दिवसेंदिवस जाली थोर । कन्या देखोनि उपवर । वरविचार ब्रह्मयासी ॥३०॥

**अहल्येसाठी इंद्रादिकांची स्पर्धा :** इंद्र साक्षेपी[7] करावया राणी । चंद्र साक्षेपी[7] करावया पत्नी। सूर्य स्वयें तिच्या वरणीं । अनुदिनीं उपार्जी[8] ॥३१॥ वरुण वायु यम कुबेर । स्कंदादि सकळ सुरवर । अहल्यावरणीं अति सादर । पडला विचार ब्रह्मयासी ॥३२॥ विधाता करी विचार । अहल्यावरणीं सर्व सादर । मा कोणाचा करूं निर्धार । प्रकारांतर[9] उपपादी[9] ॥३३॥

**ब्रह्मदेवाचा पण :** ब्रह्मयाने योजिले विंदान[10] । दों प्रहरीं पृथ्वीप्रदक्षिण । जो करून येईल आपण । त्यासी कन्यादान अहल्या ॥३४॥ ऐकोनि ब्रह्मयाचें वचन । इंद्र ऐरावतीसीं करी गमन । चंद्र मृगेसीं निघे आपण । मेषारोहणें[11] निघे अग्नि ॥३५॥ यम नियंता सकळ जगा । तोही कामाच्या लगबगां । पालाणूनिया[12] टोणगा । लागवेगां निघाला ॥३६॥ स्कंदें पालाणिला मयूर । कामें पालाणिला मकर । एवं अवघेचि सुरवर । निघाले सत्वर प्रदक्षिणे ॥३७॥ ऋषीश्वर धाकटे मोठे । धांवती मेरुतळवटें । आम्ही आपुलिये तपोनिष्ठें । करूं निजनेटें प्रदक्षिणा ॥३८॥

**गौतमांनी प्रसूतिसमयी गाईला प्रदक्षिणा करून पण जिंकला :** गौतम करितां अनुष्ठान । गोप्रसूतिकाळ जाण । उभयतोमुखी देखोनि पूर्ण । त्रिवार प्रदक्षिणा तेणें केली ॥३९॥ उभयतोमुखीप्रदक्षिण । पृथ्वीप्रदक्षिणेंसमान । हें ब्रह्मयानें जाणोनि ज्ञान । करी कन्यादान गौतमासी ॥४०॥

**त्यामुळे इंद्र कपटाचरणास प्रवृत्त :** इंद्र आला प्रथमप्रहरा । तवं अहल्येसी गौतम नोवरा । बोहलीं देखोनि वधूवरां । अभ्यंतरीं संतप्त ॥४१॥ जे जे प्रदक्षिणा करूनि येती । ते तेही श्वास टाकिती । गौतमासी अहल्याप्राप्ती । कैशा रीती जाली पां ॥४२॥ इंद्र पुसे ब्रह्मयासी । अहल्या देणें होती गौतमासी । तरी कां छळिलें आम्हांसी । प्रदक्षिणेसी धाडुनी ॥४३॥ ब्रह्मा बोलिला आपण । त्रिवार पृथ्वीप्रदक्षिण । गौतमासी घडली संपूर्ण । मग कन्यादान मीं केलें ॥४४॥ इंद्र म्हणे आम्हांहूनि गौतमासी । अधिक शक्ति चालावयासी । त्रिवार प्रदक्षिणा यासी । घडली कैसी नेणवे ॥४५॥ ब्रह्मा म्हणे न करीं छळण । उभयतोमुखींचें प्रदक्षिण । पृथ्वीप्रदक्षिणेसमान । हें जाणोनि कन्यादान म्यां केलें ॥४६॥ वचन पाहिलें वेदोक्तीं । परि अति संताप वाढला चित्तीं । म्हणे मी नाना छळणोक्तीं । अहल्या अैपती[13] स्वयें करीन ॥४७॥ चंद्र भोगिले गुरुपत्नीसी । तेवीं मी भोगीन अहल्येसी । यापरी इंद्रें निजमानसी । निश्चयासीं दृढ धरिलें ॥४८॥

**इंद्रापासून सावध राहण्याची सूचना :** ब्रह्मा सांगे गौतमासी । इंद्र अभिलाषी अहल्येसी । तरी तुम्हीं अहर्निशीं । अति यत्नेंसी राखावी ॥४९॥ गौतम तपें तेजोराशी । अहल्या आणिली आश्रमासी । इंद्र कष्टतां वर्षानुवर्षी । अहल्या त्यासी अप्राप्त ॥५०॥ पूर्ण खग्रास सूर्यग्रहण ।

---

**शब्दार्थ** – १. चंद्रकिरण, २. नागस्त्रिया, ३. कांतिहीन, राकट, ४. नाजूक, मऊ, ५. इतर काही पहावयाचे सोडून ते डोळे अहल्या-मुखाशीच रत झाले, ६. संपन्न, ७. प्रयत्नशील, ८. झटो, ९. निराळ्याच मार्गाचा अवलंब, १०. युक्ती, ११. मेंढ्यांवर बसून, १२. सजवून; जिन घालून, १३. स्वत:ची, प्राप्त.

अहल्येसहित गंगास्नान । करावया जाय गौतम आपण । अति सावधान इंद्रार्थी ॥५१॥ जालें ग्रहणविधिविधान । अहल्या करोनि मुक्तिस्नान । आश्रमासी आली आपण । द्विजभोजनपाकार्थ ॥५२॥ गौतम स्वधर्मे संपन्न । करावया राहिला दानतर्पण । तेचि संधि साधोनि पूर्ण । इंद्र आपण संचरला ॥५३॥

गौतमरूपाने इंद्राचे अहल्येकडे आगमन : गौतमाच्या स्वरूपस्थिती[1] । इंद्र आला अहल्येप्रती । तिसी नेवोनि एकांती । सवेग रति स्वयें मागे ॥५४॥ ते म्हणे नवलगती । दिवसा केवीं मागां रती । आजि पर्वकाळ पितृतिथी । काम सर्वार्थी निशिद्ध ॥५५॥ भलतसें पतीचें वचन । पाळिती पतिव्रता पूर्ण । पतिवचनालागीं दूषण । अधःपतन तें स्त्रियेसी ॥५६॥ पतीचिया वचनार्था । अनुसरावें सर्वथा । हे मर्यादा वेदशास्त्रार्था । दोष सर्वथा देखों नये ॥५७॥ पतिवाक्या दोषदर्शन[2] । देखे[2] तिसी आकल्प अधःपतन । आतां तू जाहलीस सज्ञान । पतिवचन न मानिसी ॥५८॥ जें जें माझें विरुद्धाचरण । तें तें आपुलेनि तपें मी आपण । तत्काळ करीन निर्दळण । येथें तुज कोण संदेह ॥५९॥ संकोचली स्वधर्मता । कांही न बोलवे सर्वथा । मग जावोनियां एकांता । त्यासीं रत्यर्थ अनुसरली ॥६०॥ इंद्र अहल्यासेजेवरी । तंव गौतम आला बाहेरी । परपुरुषा रतली नारी । जाणोनी द्वारीं गुप्त राहे ॥६१॥

कपटाचरण लक्षात आणल्यामुळे अहल्येचा संताप : अहल्या म्हणे एकांतवासीं । घेवोनि भ्रताररूपासी । तूं कोण येथें आलासी । कपटें भोगिसी परदारा ॥६२॥ अहल्यें इंद्र धरिला हातीं । घेवोनि भ्रताररूपाची बुंथी[3] । तूं कोण पापमूर्ती । छळोनि रती मागितली ॥६३॥ तो म्हणे मी अमरपती । येरी म्हणे पूर्ण जाली रती । आतां तूं जाई शीघ्रगतीं । दोघांची उपहती[4] ऋषि करील ॥६४॥ मर मर पापिष्ठा चांडाळा । नाहीं पापाचा कंटाळा । विटाळविलें दोहीं कुळां । दुष्टा दुःशीळा नीघ वेगीं ॥६५॥ जळो तुझे महिमान । निंद्य कर्म काळें वदन । येथोनि शीघ्र करीं गमन । देखिल्या दहन ऋषि करील ॥६६॥ तो तूं देवाचा देवाधिपती । तो तूं परदारकामासक्तीं । अचुक गेलासी अधोगती । नीघ मागुती मुख न दाखवीं ॥६७॥

गौतमाकडून अहल्या व इंद्रास शाप : लाजा इंद्र निघे बाहेरी । तंव गौतम देखिला द्वारीं । भयें कांपोनि जिव्हारीं । इंद्रगोपाकारीं[5] पळोनि गेला ॥६८॥ तंव गौतमें खुंटविली गती । जावों न शके निजशक्तीं । अद्यापि इंद्रगोपांप्रती । शीघ्रगती असेना ॥६९॥ जेणें करिसी परदाररमण । ते झडती तुझे वृषण । परभगीं आसक्त मन । भगें सर्वांगीं संपूर्ण होती ॥७०॥ इंद्र शापिला यापरी । गौतम पाहे भीतरीं । तंव अहल्या वस्त्रें सांवरी । म्हणे दुराचारी रमलीस केवीं ॥७१॥

क्षणो नास्ति रहो नास्ति नास्ति प्रार्थयिता नरः । तेन नारद नारीणां पातिव्रत्यं हि जायते ॥४॥

अहल्येची प्रार्थना : स्मृतिवेदांतवेदोक्ती । धीर धरूं न शके सती । परपुरुषें प्रार्थिल्या एकांतीं । पतिरूपोक्तीं छळिलें मज ॥७२॥ तुमचिया स्वरूपस्थिती । तेणें मज मागितली रती । मी रमलें तुम्हांप्रती । कषट निश्चितीं मी नेणें ॥७३॥ तुमचिया वचनार्था । ना न म्हणावे तत्वतां । याच्या कपटाची वार्ता । मी सर्वथा जाणेंना ॥७४॥ स्वामींच्या वचना उल्लंघन । तेंचि मज अधःपतन । येणे भयें मीं आपण । स्वधर्माचरण विचरलें ॥७५॥ इंद्रअहल्याएकांतवार्ता । गौतमें ऐकिल्या निजगुप्ता । तेंचि सांगतसे तत्वतां । तूं निजकामार्था रमलीसी ॥७६॥

शापवाणी : संभोगीं परपुरुष जाणतां । जरी तूं उठतीस हाणोनि लाथा । तरी मी मानितों पतिव्रता । तूं पूर्णकामता रमलीसी ॥७७॥ ओळखोनि परपुरुषता । तूं बोलिलीसी भोग

---

शब्दार्थ - १. स्वरूपाने, २. दोष ठेवते, ३. बुरखा, आच्छादन, सोंग, ४. नाश-शिक्षा, ५. मोराच्या रूपाने.

भोगितां । तुझी जाली पूर्णकामता। ऋषि न येतां तू जाय ।।७८।। जाणोनि परपुरुषाचें ज्ञान। भोगीं कंटाळेना तुझें मन । ते तूं होसी पाषाण । शिळा जाण जडत्वें ।।७९।। परपुरुषीं कामाचा सोहळा । ते तूं होसी महाशिळा । तुज कोणी न देखे डोळां । भूतें विटाळा मानिती तुझ्या ।।८०।। वृक्ष फुलां फळां न येती । छायेसी नव्हे विश्रांती। आश्रमीं प्राणी न वसती । पापोपहती[१] भोगिसी ।।८१।। येरी बोलली आपण । पतिभ्रमें लागलें दूषण । स्वामीनें कृपा करावी । पूर्ण शापमोचन वदावें ।।८२।।

गौतमाकडून उःशाप : ऐकोनि तिचें दीन वचन । कृपेनें कळवळला संपूर्ण । म्हणे लागल्या श्रीरामचरण । तैं तूं जाण उद्धरसी ।।८३।। तुज जंव भेटती रामचरण । तंववरी करावें रामस्मरण । रामनामापरतें आन । प्रायश्चित जाण असेना ।।८४।। रामनामाच्या आवृत्तीं । जळती पापांचिया पंक्ती । शिळारूपें तुझी लोपेल मती । तरी राम चित्तीं न विसंबें ।।८५।। ऋषि पाठिमोरा जाला । तंव अहल्या जाली शिळा । आश्रम पावला अवकळा । प्राणी तत्काळ पळाले ।।८६।। कैसें शापाचें अति बळ । मुंगी माशी सांडी स्थळ । पक्षी पळाले सकळ । श्वापदांचे मेळे सवेग गेले ।।८७।।

शाप दिल्याबद्दल गौतमांना पश्चाताप : शाप देवोनि कोपदृष्टीं । गौतमें सांडिली पर्णकुटी । सवेंचि अनुताप जाला पोटीं । म्हणे क्रोधें उठाउठी जिंकिलें मज ।।८८।। अहल्या इंद्रा अति प्रीतीं । सुखभोग भोगितां एकांतीं । तेव्हा कां मज नुपजे शांती । स्त्रीकामासक्तीं नाडिलों क्रोधें ।।८९।। रतिसंभोगएकांतवासी । इंद्र असतां अहल्येपासीं । अनुद्वेगें[२] त्यागोनि त्यांसी । मी कां तपासी न वचेंचि ।।९०।। सर्वांतरात्मा भोक्ता एक । ऐसा जाणता जो मी देख । त्या मज इंद्रभोगाचें दुःख । ज्ञानेसीं विवेक गिळिला क्रोधें ।।९१।। माझी स्त्री माझे घर । हें कामक्रोधांचें निजमंदिर । येथे ठकले थोर थोर । मजही साचार नाडिलें क्रोधें ।।९२।। माझी स्त्री हा जो अभिमान । हें सकळ दुःखाचें भाजन[३] । हेंचि क्रोधाचें जन्मस्थान । तेणें मी संपूर्ण नाडलों ।।९३।। गौतम पावन त्रिजगतीं । ऐसी पुराणीं प्रसिद्ध वदंती[४] । तो मी स्त्रीलोभानुवृत्तीं[५]। विवेकसंपत्ती नाडिलों क्रोधें[६] ।।९४।। म्यां गौतमें मध्यान्हकाळीं । नित्य पिकवोनियां साळी । ऋषी वांचविले दुष्काळीं । तो मी तत्काळां नाडिलों क्रोधें ।।९५।। मुख्यत्वें स्त्री-कामापासीं । क्रोध सर्वदा मुसमुसी[७] । तेणें नाडिलें मज गौतमासी । म्यां कोणापासीं सांगावें ।।९६।।

कामक्रोधाचा प्रभाव : मातेवरी गालिप्रदान[८] । भलता साहे करोनि हेळण । स्त्रीवरोनि शिवी देतां जाण । तत्काळ मरण शस्त्रें का शापें ।।९७।। वाप क्रोधाची निजख्याती । त्या दोघांची केली उपहती । मज नाडिलें ज्ञानविरक्तीं । क्रोध परमार्थीं घातक ।।९८।। क्रोध केवळ महामांग। जिवें मारिलें वैराग्य । सकळ योगा होय भंग । क्रोधें सर्वांग अति पवित्र ।।९९।। मातगविटाळा[९] जळे निवृत्ती । क्रोधाची चित्तामाजी वस्ती । त्याचे क्षाळणीं न चले युक्ती । क्रोध सर्वार्थीं घातक ।।१००।। का ते कांता कस्ते पुत्रः । ऐसें म्यां वाचिलें शास्त्रा । तें वृथा गेलें पुराणपत्रा । क्रोधें अपवित्र मज केलें ।।१।। कामासी जे वश होती । ते कांहीं तरी भोग भोगिती । जे आतुडले[१०] क्रोधाहातीं । ते वृथा नागवती भोगमोक्षां ।।२।। क्रोधाऐसी वैरी । बैसला असतां जिव्हारीं[११] । जो तयाची मानी थोरी । तोचि चराचरीं अति मूर्ख ।।३।।

अपकारिणि कोपश्चेत्कोपे कोपः कथं न ते । धर्मार्थकाममोक्षाणां प्रसह्य परिपंथिनि ।।१।।

अपकारियावरी कोप करिती । परी कोणी कोपावरी कोप न करिती । क्रोध वाटपाडा निश्चतीं । चहूं पुरुषार्थीं नागवी ।।४।। त्या क्रोधाची होय शांती । तैसें आचरेन तपस्थितीं । ऐसा निश्चय करोनि चित्तीं । ऋषि तपार्थी निघाला ।।५।।

शब्दार्थ - १. पापाचरणापासून होणारे त्रास, २. शांतपणाने, ३. पात्र, ४. बातमी, चर्चा, ५. स्त्रीलोभाने, ६. क्रोधामुळे विवेकभ्रष्ट झालो, ७. भरास येतो, ८. आईवरून शिव्या देणे, ९. मांगाचा विटाळ झाला असता, १०. सापडले, ११. मर्मस्थानी

एवमुक्त्वा महातेजा गौतमो ऋषिसत्तमः । पुण्यदेशं समासाद्य सिद्धचारणसेवितम् ॥६॥

सिद्धचारणलोकावरी । मेरुगिरीच्या पाठारीं । हिमाचळाच्या शिखरीं । तपातें आदरी गौतम ॥६॥ गौतम बैसोनि निर्विकारी । अगाध निष्ठतें आदरी । कामक्रोधांचा नुरे उरी । त्या तपाची थोरी थोरावे ॥७॥

शापामुळे इंद्राची अवस्था : ब्रह्मशाप अति दारुण । इंद्राचे झडले वृषण । भगें बिंबली संपूर्ण । तेंही लक्षण अवधारा ॥८॥ परदारनिरीक्षण[1] । भगांकित जाले नयन । परदारमुखचुंबन। भगांकित वदन तेणें झालें ॥९॥ परदारालिंगन । हृदयीं भगें पडलीं जाण । बाहु भगांकित जाले जाण । अंगुल्या संपूर्ण भगांकित ॥११०॥ परदाराधरपान । जिव्हा भगांकित जाली जाण । भृकुटिया खुणाविली खूण । त्या भृकुटी संपूर्ण भगांकित ॥११॥ परदारप्रतिगमन । भगांकित जाले चरण । खालें तळवांही जाण । भगें संपूर्ण बिंबलीं ॥१२॥ परदारेंसीं कामगोष्टी । भगांकित जाला दोहीं होटीं । भगें पडलीं लल्लाटीं । भगीं पाठी पुरविली ॥१३॥ इंद्र पावला उपहती । सर्वांगें भगें स्रवती । निजकर्माची मानोनि खंती । अधोगती विलपत[2] ॥१४॥ इंद्र सर्वांगीं भगांकित । तो पक्षियांमाजी राहिला गुप्त । पाहतां देव ऋषी समस्त । तें अभिव्यक्त[3] लक्षेना ॥१५॥

शापाचे परिणाम : इंद्रें सांडिलें अमरमंडळ । मेघ जाले उच्छृंखळ । पृथ्वी झाली मंदफळ । स्वधर्म सकळ खुंटले ॥१६॥ यालागीं साक्षेपें इंद्रासी । शोधिते जाले देव ऋषी । बृहस्पति सांगे तयांपासीं । गौतमासी उःशाप मागा ॥१७॥ मग मिळोनि देवऋषी । अवघे आले गौतमापासीं । उद्धरण करावया इंद्रासी । समस्तीं त्यासी प्रार्थिलें ॥१८॥ गौतमें अनुतापें जाण । केलें क्रोधाचें निर्दळण । देव प्रार्थितांचि जाण । कृपेनें संपूर्ण कळवळिला ॥१९॥ इंद्र पावला उपहती[4] । त्याची पुरविल्यापरिस[5] महंती । अतिशयें करीन वाढती । स्वयें वरदोक्ति वदता झाला ॥१२०॥ इंद्र होता मयूरवेषें । उःशाप होतांचि डोळसें । सर्वांगीं उभारोनि पिसें । अति उल्लासें नाचत ॥२१॥ इंद्र होता भगांकित पूर्ण । ती भगें होतील लोचन । तैंपासोनि सहस्रनयन । इंद्र अभिधान[6] पावला ॥२२॥

इंद्राकडून गौतमस्तुती, इंद्राला उःशापप्राप्ती : इंद्र म्हणे जय जयजी गौतमा । पुरुषांमाजी उत्तमोत्तमा । न कळे तुझा महिमा । अगाध महिमा पैं तुझा ॥२३॥ त्वां शाप नाहीं दिधला । माझा कर्मभोग म्यां भोगिला । जो दुराचारी तो सरता[7] केला । हे महत् लीला पैं तुझी ॥२४॥ ऐसी इंद्रें केली स्तुती । तेथें देवहि गौतमातें स्तविती । अलोलिक तुझी ख्याती । अपराधी निश्चित त्वां उद्धरिली ॥२५॥ इंद्रपणाची ते खूण । मयूरीं आभासे पूर्ण । तैं त्यासी नव्हते वृषण। मयूरासी स्त्रीरमण असेना ॥२६॥ मयूर आनंदें नृत्य करी । वीर्य स्रवे नेत्रद्वारीं । तें झेलोनि ने मयूरी । तेणेंचि उदरीं गर्भ तिसी ॥२७॥ पूर्ण महत्त्व आलें इंद्रासी । परी ठाव नाहीं पुरुषत्वासी। तेव्हां गजाचे वृषण देवोनि त्यासी । पुरुषत्वासी पूर्ण केलें ॥२८॥ गजदेही नाहीं वृषण । तेणें तो जाला वीर्यक्षीण। त्यासी दिधले इंद्रें वृषण । तेणें मस्तकीं संपूर्ण वंदिलें ॥२९॥

इंद्रपाशामुळें मोर आणि हत्तीवर परिणाम : यालागीं गजाचे देहीं । अद्यापि लिंगीं वृषण नाहीं । ते भासती मस्तकाचे ठायीं । कुंभेभ[8] पाहीं यालागीं म्हणती ॥१३०॥ रतिकाळीं आपण । लिंगापासीं येती वृषण । येऱ्हवीं ते मस्तकीं जाण । कुंभेभ पूर्ण यापरी भासे ॥३१॥ गजाचिया वृषणस्थितीं । इंद्रासी जाली ऐश्वर्यप्राप्ती । यालागीं त्यासी ऐरावती । देवीं समस्तीं ठेविलें नांव ॥३२॥ इंद्रापासीं गजाचे वृषण । तेणें त्यासी बळ संपूर्ण । गजापासीं इंद्रवृपण । शक्रसमान गळ त्यासी ॥३३॥ गजास बळ शक्रासमान । शक्रें वाढविलें गजमहिमान ।

शब्दार्थ - १. परस्त्रीकडे वाईट वासनेने पहाणे, २. विलाप करीत, ३. स्पष्ट, ४. दुःख, ५. पूर्वीच्याहून, ६. नाव, ७. श्रेष्ठ, ८. गंडस्थलयुक्त हत्ती.

गजदळें दळ[1] शोभायमान । येरवीं तें जाण रुंडमुंड ।।३४।। गजेंद्रासी राज्यप्राप्ती । यालागीं गजांतलक्ष्मी म्हणती । समस्त प्रजा नमस्कारिती । ते पूर्णस्थिती लक्ष्मीची ।।३५।। एवं ऋषिवाक्यकृपास्थितीं । इंद्र पावला उपहती । त्यासी वाहून ऐरावतीं । नेला स्वर्गाप्रती जयजयकारें ।।३६।। इंद्रअहल्याआख्यान । ऋषीनें सांगितलें संपूर्ण । अहल्येचे पाषाणपण । करीं उद्धरण श्रीरामा ।।३७।।

अहल्येचा उद्धार : ऐकोनि सद्गुरूचें वचन । वेगीं उठला रघुनंदन । करावया अहल्योद्धरण । आश्रमीं आपण प्रवेशला ।।३८।। हातीं धरोनि ऋषिवर्यासी । आश्रमीं पाहे अहल्येसी । ते लक्षेना सकळां ऋषींसी । पाहतां चौंपासीं दिसेना ।।३९।। आश्रमीं करितां परिभ्रमण[2] । अवचट लागला रामचरण । जालें अहल्योद्धरण । साष्टांगी नमन त्या केलें ।।१४०।। मस्तकीं धरिलें श्रीरामचरण । आनंदाश्रू चालिले पूर्ण ।.जालें श्रीरामचरणप्रक्षाळण[3] । प्रेम संपूर्ण अहल्येसी ।।४१।।

श्रीरामस्तुती : म्हणे जय जय रामचंद्रा । शिळा तारिली पदमुद्रा । तुझा चरण तारक जगदुद्धारा। भवसागरा लागतां ।।४२।। तुझा लागतांचि श्रीचरण । शिळा उद्धरें हें नवल कोण । कर्माकर्माची बोळवण । प्रपंच तो पूर्ण परमार्थ होय ।।४३।। न होतां तुझी चरणभेटी । प्रपंचाची सबळ गोष्टी । तुझे चरण देखतां दृष्टीं । प्रपंच उठी ब्रह्मत्वें ।।४४।। तुझा लागतांचि श्रीचरण । स्थूळ लिंग आणि कारण । महाकारणेंसीं जाण । होय परिपूर्ण परब्रह्म ।।४५।। तुझे लागतांचि पाय । देह तो होय विदेह । संदेह होती निःसंदेह । जीव तो होय शिव साक्षी ।।४६।। अगाध चरणांची ख्याती । वनितां[4] मौनावल्या[5] श्रुती । चरणां शरण चारी मुक्ती । कथानुवृत्तिअनुवादें ।।४७।। अनुवादतां रामकथा । कळिकाळ वोढवी माथा । तीर्थें वंदिती चरणतीर्था । कथा ऐकतां देव निवती ।।४८।। आवडीं गातां रामायण । श्रीराम सुखावें आपण । वक्त्यांचे निरसे[6] जन्ममरण । श्रोते संपूर्ण ब्रह्म होती ।।४९।। ऐसी हे तुझी निजकथा । पावन करी लोकां समस्तां । असो कथानुवादवार्ता । नाम स्मरतां निजमुक्ति ।।१५०।। नित्य स्मरतां रामनाम । सकळ पातकां करी भस्म । चहूं पुरुषार्थांचें[7] काम । होय सुगम हरिनामें ।।५१।। करितां रामनामस्मरण । जन्ममरणासी ये मरण । समूळ विरे मीतूंपण । भवबंधन बाधेना ।।५२।। बाधेना मायामोहन । बाधेना कर्मबंधन । बाधेना त्रिविधविंदान । रामस्मरण करितांचि ।।५३।। दृश्य द्रष्टा आणि दर्शन । ध्येय ध्याता आणि ध्यान । ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान करितां रामस्मरण । त्रिपुटीचें भान असेना ।।५४।। असेना देहीं अहंभाव । असेना जीवीं जीवभाव । मीतूंपणा नाहीं ठाव । नामनिर्वाह श्रीरामें ।।५५।। रामनामाच्या गदारोळें[8] । स्मरत्या शरण रिघिजे काळें । भवभय[9] समूळ पळे । सुखसोहळे श्रीरामें ।।५६।। श्रीरामनामगजरें । ब्रह्म स्वानंदें हुंवरे । जेवीं धेनु वत्सा अनुसरे । तेवीं नामोच्चारें श्रीराम ।।५७।।

नाममाहात्म्य : श्रीराम हें नामाक्षर । क्षराक्षरातीत पर । नाम परब्रह्म परात्पर । नाममंत्र शिवसेव्य ।।५८।। नामापासीं सद्यः मुक्ती । पंडित बोलती पुराणोक्तीं । मी बोलिलों ते माझी प्रतीती । नाम निश्चितीं तारक ।।५९।। नामें भुक्ती नामें मुक्ती । नामापासीं ब्रह्मप्राप्ती । रामनाम जे जपती । वंद्य त्रिजगतीं तेचि पैं ।।१६०।। रामनाम परम तप । रामनाम परम तप । रामनाम निरसी[10] पुण्य पाप । नाम निर्विकल्प समाधि ।।६१।। नामीं नाहीं अनध्याय[11] । नामीं सर्वदा स्वाध्याय[12]। नाम प्रत्यक्ष परब्रह्म पाहें । अभाग्या भाव उपजेना ।।६२।। नामीं नाहीं अनध्ययन ।

---

शब्दार्थ - १. सैन्य, २. किरणे, ३. श्रीरामचंद्राचे पाय धुणे, ४. बोलता, ५. पुढे करतो, वाकवितो, ६. नाश पावते, ७. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांचे, ८. महाघोषाने, ९. क्षर-विनाशी, अक्षर-अविनाशी, या दोहींच्याही पलीकडील, १०. नाहीसे करते. ११. अभ्यास न करणाचा दिवस, १२. अभ्यास करण्याचा दिवस.

नामीं नाहीं विधिविधान । नामीं नाहीं कर्मबंधन । नामें पावन महापापी ।१६३।। जरी जाला दुराचारी। तो जैं भरे अनुतापभरीं[1] । रामनामें जपे जिव्हारी। तो साधु संसारी भगवद्वाक्यें ।।६४।।

अहल्येने केलेली स्तुती : श्रीरामकृपानिजदीप । अहल्येचें गेलें आकल्पपाप । तिच्या तपाचा प्रताप । पात तें निष्पाप करूनि दावी।।६५।। इंद्र न करितां व्यभिचार । शाप न देता ऋषीश्वर । तैं मी कैंचा पावतें रामचंद्र । भाग्य माझें थोर ऋषिशापें ।।६६।। गौतमाचा निजशाप । तो मज जाला अमृतरूप । माझें जावोनि पुण्यपाप । शुद्ध स्वरूप पावलें ।।६७।। इंद्र केला नाहीं व्यभिचार । केला माझा जन्मोद्धार । गौतमशाप नव्हे तो वर । तेणें रघुवीर भेटविला ।।६८।। गौतम माझा निजभ्रतारू । गौतम माझा निजसद्गुरू । गौतम माझा निजनिर्धारू । तेणें रघुवीरू भेटविला ।।६९।। जगीं उदंड आहेत वीर । परी छेदूं न शकती अहंकार । परम योद्धा श्रीरामचंद्र । मारिला सहपरिवार अहंभाव माझा ।।१७०।। ऐसी अहल्या करितां स्तुती । गौतमा कळलें ज्ञानशक्तीं । तेणें येवोनि शीघ्रगतीं । स्वयें रघुपति पूजिला ।।७१।। कामक्रोधां निर्दाळी गौतम । अहल्या श्रीरामें निष्काम । दोहांची वृत्ति सहजें सम । रामें परब्रह्म पावलीं।।७२।।

गौतम अहल्या पुनर्मीलन : श्रीरामें देवोनि भेटी । दोहींची सोडिली लिंगगांठी । सच्चिदानंदें आली पुष्टी । दोघां समदृष्टी समत्वें ।।७३।। दोहींचें एक देखणेपण । दोहींचे एक सावध श्रवण। दोहींचे एक मन उन्मन। दोन्ही चैतन्यघन श्रीरामें ।।७४।। दोहींचा एक आत्मा एक प्राण । दोहींचें एक अंत:करण । दोहींचें एक निजज्ञान । दोघे सुखसंपन्न एकात्मता ।।७५।। दोहींची एक शब्दसिद्धी । दोहींची एक इंद्रियविधी । प्रपंचीं परमार्थीं समान बुद्धी । दोघां समाधी एकचि ।।७६।। ऐसीं एकात्मतानिष्ठ । दोघां भरिला शेंसपाट । गौतम ऋषिवर्य वरिष्ठ । अहल्या श्रेष्ठ पतिव्रता ।।७७।। ऐशी एकात्मता पूर्ण । स्वयें श्रीराम आपण । केलें अहल्योद्धरण । गौतम संपूर्ण सुखी केला ।।७८।। सुखी संपन्न ऋषीश्वर । हर्षें निर्भर सुरवर । वर्षती सुमनांचे संभार । जयजयकार प्रवर्तला ।।७९।। एकात्मता तरलों म्हणती । शेखीं[2] भेददृष्टीं विषयासक्ती। ऐसी ऐकोनियां मुक्ती । श्रोते हांसती सज्ञान ।।१८०।। कवित्व करिती धीटपाठ । मेळविती कर्मकचाट[3]। तेंवि कवित्वाची कटकट । श्रोते वीट मानिती ।।८१।। जे कवित्वीं शब्दचातुर्यशोभा । ते शाब्दिकासी[4] अतिवल्लभा । जे कथा परमार्थज्ञानगाभा[5] । ते कथाजगदंबा जग निववी ।।८२।। ज्ञानी निवती परमार्थबोधें । पंडित निवती पदबंधें । लोक निवती कथाविनोदें। ग्रंथसंबंधें जग निवे ।।८३।। मुख्यत्वें ग्रंथींचें राखावे प्रेम । प्रतिपदीं प्रतिपादावें[6] परब्रह्म । हाचि कवित्वाचा कवित्वधर्म । श्रोते सप्रेम होती सुखी ।।८४।। कथा रम्य रामायण । एका जनार्दना शरण । जालें अहल्योद्धरण । जानकीवरण तें ऐका ।।८५।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां अहल्योद्धरणं नाम चतुर्दशोऽध्याय ।।१४।। ।। श्लोक ।।६।। ओंव्या ।।१८५।। एवं ।।१९१।।

## अध्याय पंधरावा

।।श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### सीतेचा पूर्वजन्मवृत्तान्त

पदकमलरजोभिर्मुक्तपाषाणदेहा त्वियमभवदहल्या गौतमे धर्मपत्नी ।
त्वयि चरति विशीर्णग्रावविंध्याद्रिपादे कति कति भवितारस्तापसा दारवंत: ।।१।।

श्रीरामचरणस्पर्शाचा परिणाम : लागतां श्रीरामपादरज:कण । जावोनियां पाषाणपण । जाहलें अहल्योद्धरण । तें दारग्रहण गौतमें केलें ।।१।। चरणरजांचा प्रताप । अहल्या जाहली निष्पाप। हरून गौतमाचा विकल्प । स्त्री अनुरूप प्रतिव्रता ।।२।। अगाध पदमहिमा देखोन । विस्मित

---

शब्दार्थ - १. शेंस, २. अखेरीस, ३. कर्मांचा त्रास, ४. शब्दशास्त्रज्ञास, ५. परमार्थपर कवित्व, ६. सिद्ध करून दाखवावे.

जाले ऋषिजन । स्वर्गीं सुरवर करिती स्तवन । नाम पावन तिहीं लोकीं ॥३॥ पुढें विंध्याद्रीचे ठायीं । जे पाषाण लागती रामपायीं । ते निःशेष विरोनि पाहीं । उठतील स्त्रीदेहीं सुंदरत्वें ॥४॥ तयां स्त्रियांतें देखोन । बहुसाल[1] तपस्विजन । ब्रह्मचर्य विसर्जून[2] । दारग्रहण[3] करितील ॥५॥

ऋषिमुनींचे मिथिलानगरीकडे प्रयाण : एवं ऋषिवर्यमंडळी । रामकीर्तनाचे समेळीं । चालती आनंदकल्लोळीं । पुढे मिथिला देखिली ॥६॥

विदेहपुरीचे वर्णन : विदेहाची विदेहपुरी । पताका झळकती चिदंबरी । रविचंद्रांची लोपोनि थोरी । रत्नकळसांच्या हारी शोभती॥७॥ वनश्रियेचिया शोभा। पूणत्वें पूर्ण करी नभा । प्राण स्तब्ध[4] राहे उभा । होय प्रवेशारंभा आल्हाद ॥८॥

निसर्गसौंदर्य : वृक्ष समूळीं सपत्रीं गोड । बीजेंवीण फळांचे घड । देखतां पांथिकांचे पुरे कोड[5] । छाया सेवितां चाड निचाड[6] होय ॥९॥ नवल त्या छायेची विश्रांती । कामक्रोधां होय शांती । त्रिविध[7] ताप[7] स्वयें शमती । भ्रांति ते चिच्छक्ती स्वयें होय ॥१०॥ सेवितां त्या फळांचा स्वाद । क्षुधेतृषेचा निमे बाध । सबाह्य कोंदे परमानंद । अति सुस्वाद विटेना ॥११॥ जाणोनि त्या फळांची गोडी । शुकांची सवेग पडे उडी । तृप्ती लाहोनियां गाढी । उडण्याची ओढी विसरोनि गेली ॥१२॥ विदेहवनींच्या हंसांसी । नवलीला दिसे त्यांसी । सांडोनि उभय पक्षांसी । चिदाकाशीं उड्डाण ॥१३॥ देखोनि ते वनस्थळी । मुमुक्षुमयूर स्वानंदमेळीं । पिच्छें पसरोनि रोमावळी । सुखसुकाळीं नाचती ॥१४॥ विदेहवनींचा सुगंध । पावतां प्रकटे परमानंद । देही पावे आनंद । होय निजबोध स्वानंदें ॥१५॥ स्वानंदें मयूर गर्जती । तेणें वेदार्थ चवकती[8]। सांडोनि कर्मवादवृत्ती । निश्चल राहती निःशब्दें ॥१६॥ वनीं पारवे ते घुमती तेणें गंधर्वगाणीं वेडावती । सामवेदाची उपरमे वृत्ती । पक्षी बोलती अनुताम्य ॥१७॥ प्रवेशतां रामचरण । ऐसी स्थिति पावे उपवन । हें विदेहाचें विदेहवन । अगाध महिमान कोण वर्णी ॥१८॥ स्वधर्में वसतां नगरीं । पिंगळा वेश्या समाधी वरी । ते विदेहाची विदेहपुरी । कोणें थोरी वर्णावी ॥१९॥ ज्याचे द्वारपाळाचें वचन । शुकासी दे समाधान । हें जनकाचें अति महिमान । अगाध लक्षण परमार्थीं ॥२०॥

स्वयंवर यज्ञमंडपावरील रूपक : तेचि नगरबाह्यप्रदेशीं । राम देखे जनकयागासी । जो सीतास्वयंवरोद्देशीं[9] । बहुक्लेशेंसीं योजिला ॥२१॥ धैर्याचा स्तंभ निर्धारीं । धर्माचे आडवळे[10] तयावरी । शांतीनें सेविला कुसरी । त्या मंडपामाझारी यज्ञवाट[11] ॥२२॥ निर्धूम अग्नि अति उद्भट । इंधनेंविण अति लखलखाट । ज्वाळा अतिशयें चोखट । सुखस्वादिष्ट प्रकाश ॥२३॥ ॐकारअर्धमात्रा निजार्थें जे जाणती पैं परमार्थें । तेचि होते[12] पोते[12] उद्गाते[12] । अक्षरार्थें द्वारपाळ ॥२४॥ निर्गुणेसीं वळिलें त्रिगुण । तेंचि तेथींचें त्रिसंधान[13] । विवेकाचें परिस्तरण । परिसमूहन नैराश्यें ॥२५॥ निष्कंटक इध्मा[14] पूर्ण । भूता ऐक्यें बर्हिर्ग्रंथन । श्रद्धा आज्यस्थाली स्थापून । स्रुक्स्रुवामार्जन प्रत्यगावृत्ति ॥२६॥ वक्रबुद्धीच्या वक्रोक्ती । त्याचि आघाराज्याहुती । पाठीं प्रधानहोम होमिती । सहित प्रकृतिमहत्तत्वेंसीं ॥२७॥ युक्तिप्रयुक्तीं ज्ञानाभिमान । द्रव्य दारा ममता मान । गुरुमंत्रे त्यांचे केलें हवन । विनियोगविधान न ममेति ॥२८॥ सावधानतासादृश्य । कर्मी ब्रह्मतारहस्य । अवमृथस्नानसामरस्य[15] । निमज्जनीं उल्लास परमानंदें ॥२९॥ क्षेत्रा प्रतिपाळी संपूर्ण । क्षेत्रपाळ जो चिद्घन । त्यासी देती विषयांचें बळिदान । वासनास्मरणसमवेत ॥३०॥ यालागीं त्या बळिदानासी । परतोनि पाहों नये त्यासी । स्मरण

---

शब्दार्थ - १. पुष्कळ, २. सोडून, ३. स्त्रीचे पाणिग्रहण, ४. चलन-लनरहित , अवस्थेत, ५. इच्छा, ६. निरिच्छ, ७. आध्यात्मिक, आधिदैविक व आधिदैविक, ८. चकित होती, ९. जानकी, स्वयंवरार्थ, १०. तुळ्या इ. ११. यज्ञभूमी, १२. यज्ञांती ऋत्विज, १३. शुल्बनामक रज्जू, १४. सर्पण (पंधरा समिधा), १५. यज्ञसमाप्ती समयाच्या स्नानाचा आल्हाद.

उरों नये मानसीं । एवं शुद्धविधीसी बळिदान ॥३१॥ अखंडत्वें नित्यस्थिती तेचि वसुधारा अहारोतीं । अहंकाराची पूर्णाहुती । फळसंयुक्तीं होमिली ॥३२॥ स्वयें सांडणें मीतूंपण । हेंचि श्रेय:संपादन[1] । आत्मत्व देणें हे अगाध दान । समाधान स्वानंदे ॥३३॥ परमानंदें अभिषिंचन । सर्वेंचि भवभय-विसर्जन । ऐसा विदेहाचा यज्ञ । रामें आपण देखिला ॥३४॥ नाना देशींचे ब्राह्मण । नाना भाषा अति प्रवीण । वेदशास्त्रार्थीं अति संपन्न । देदीप्यमान तेजस्वी ॥३५॥ ऐसिया ब्राह्मणांच्या थाटी । विदेहाच्या यज्ञवाटीं । श्रीरामें देखोनियां दृष्टीं । अत्यंत पोटी सुखावला ॥३६॥

श्रीरामाच्या यज्ञभूमीजवळ निवास केला : श्रीराम म्हणे विश्वामित्रासी । स्वामीनें रहावें यज्ञवाटापासीं । वचन मानलें कौशिकासी । तेचि प्रदेशीं निवास केला ॥३७॥ महीवतीचें स्वच्छ जीवन। तीरीं अगाध उपवन । सदाफळी शोभायमान । तें निवाडस्थान श्रीरामाचें ॥३८॥ घेवोनि ऋषिवरांचा संभार । आला ऐकोनि विश्वामित्र । जनक धांवला सत्वर । केला नमस्कार सद्भावें ॥३९॥ हर्षें दिधलें शतगोदान । केले मधुपर्कपूजन । तैसेच पूजिले ऋषीजन । साधुसज्जन आल्हादें ॥४०॥ राजा बोलिला हरिखें जाण । आजि सुफळ माझा यज्ञ । आजि माझे सुफळ नयन । साधुदर्शन देखोनी ॥४१॥ साधूंसी क्षेत्रआलिंगन । तेणें शरीर होय पावन । साधूंसीं मृद भाषण । वाचा पावन तद्योगें ॥४२॥ साधूंचें चरणतीर्थ । सेवितां अंतर पुनीत । साधुसंगें सुनिश्चित । ब्रह्मप्राप्ति भाविका ॥४३॥ बहुकाळ याग यजितां विधीं । यज्ञीं नव्हेचि यज्ञसिद्धी। तूं आलासि कृपानिधी । यज्ञाची त्रिशुद्धी सिद्धी झाली ॥४४॥ कौशिक रायातें पुसत । स्वस्थ राज्य स्वस्थ चित्त । येरु म्हणे हे कृपासमर्थ । स्वस्थ सुनिश्चित सर्वार्थभावें ॥४५॥

राजा जनकाकडून श्रीराम-लक्ष्मण वर्णन : राजा पुसे दोघे जण । अग्नितेजें विराजमान । हेही उपमा यांसी गौण । तेंही लक्षण अवधारीं ॥४६॥ अग्निसान्निध्य सर्वांतें तावी । यांची सन्निधि सर्वांतें निववी । यांची पाहतां पैं पदवी । जीवींच्या जीवीं आल्हाद ॥४७॥ यांचे देखिलिया दर्शन । डोळियांस नावडे आन । यांच्या स्वरूपीं जडलें मन । चित्त चिंतन विसरूनी ॥४८॥ सुंदर आणि सुकुमार । रूपरेखा मनोहर । ठाणमाण अति गंभीर । हे कोणाचे कुमर नृप पुसे ॥४९॥ दुर्गम मार्ग अति दारुण । यांचें कैसेनि आगमन । तुजसी यांसी कां सन्निधान । हें समूळ कारण मज सांग ॥५०॥

विश्वामित्रांचे उत्तर : ऋषि म्हणे हे दशरथाचे कुमर । रामलक्ष्मण महावीर । ऐक राया यांचे चरित्र । अति पवित्र सांगेन ॥५१॥ माझा याग न पवे सिद्धी । मारीच सुबाहु सदा बाधी । ताटिका सर्व मार्ग[2] विरोधी । आश्रमा त्रिशुद्धी उपहती[3] करी ॥५२॥ यालागीं म्यां अनुष्ठान । करूनि हर केला प्रसन्न । तेणें मज करूनि सावधान । हें गुह्य ज्ञान सांगितलें ॥५३॥ साक्षात् पूर्ण परब्रह्म । अवतरलें दाशरथि राम । त्याचेनि सिद्धि पावेल होम । राक्षसां भस्म तो करील ॥५४॥ शिववचनविश्वासीं । म्यां जावोनि दशरथापासीं । मागून आणिलें श्रीरामासी । निजयागासी सिद्ध्यर्थ ॥५५॥ मार्गीं ताटिका छेदिली । मार्गस्थां मार्ग[4] निर्मुक्ती केली । सिद्धाश्रमीं वस्ती जाली । ख्याती लाविली राक्षसां ॥५६॥ सुबाहु निवटिला बाणधारा । मारीचास लागला पिसारा । तो उडविला समुद्रतीरा । येरा निशाचरां निर्दाळिलें ॥५७॥ अवचट लागतां चरणीं । अहल्या उद्धरली तत्क्षणीं । अगाध श्रीरामाची करणी । वेदपुराणीं जगद्वंद्य ॥५८॥ तो हा हरचापदर्शनेच्छा[5] । आला असे आम्हांसरिसा । देखोनि श्रीरामाचा ठसा[6] । जनकमानसा उल्लास ॥५९॥ सीतेसी अनुरूप नोवरा । श्रीरामचि निजनिर्धारा । परी धनुर्धारणां महावीरां । अति दरारा बळिष्ठ ॥६०॥

सीतेचा जन्मवृतान्त : जनक म्हणे ऋषिराजा । सीता माझी निजात्मजा । परी ते मुख्य अयोनिजा । ऐक महाद्विजा तो भाव ॥६१॥

शब्दार्थ - १. श्रेय घेणे, २. अडवून ठेवी, ३. पीडा, ४. मार्गांची सुटका, ५. शिवधनुष्य पाहण्याच्या इच्छेने, ६. ऐट, दिमाख.

अपवाहयत: क्षेत्रं हलाग्रादुत्थितामिमाम् । सर्वलक्षणसंयुक्तां नाम्ना सीतेति विश्रमात् ॥२॥

नांगर वाहतां शेतीं । पेटी लागली हलाचिये[1] दांतीं । ती उघडितां त्यामाजी हे आंत होती । रूपवती ममात्मजा ॥६२॥

शतानंदाकडून कथाकथन : ऐकोनि रायाचा शब्द । अहल्याकुमर शतानंद । जनकपुरोहित प्रसिद्ध । तेणें पूर्वानुवाद[2] आरंभिला ॥६३॥ ब्रह्मशापाचें क्रूर अज्ञान । त्यामाजी माझी माता निमग्न । तिसी लागतां श्रीरामचरण । जाली उद्धरण जगद्वंद्य ॥६४॥ लागता श्रीराम-चरण । स्वयें उद्धरती पाषाण । हेंही नवल नव्हे जाण । जगदुद्धारण श्रीराम ॥६५॥

नाममहिमा : अगाध श्रीरामाचें नाम । नाम निर्दाळी क्रोध काम । नाम निवारी मरण जन्म । नाम तें ब्रह्म निर्द्वंद्व ॥६६॥ अबद्ध पढतां वेद । तत्काळ बाधी निषेध । अबद्ध नामें प्रसिद्ध । होती शुद्ध महापापी ॥६७॥ अबद्ध मंत्राच्या आवर्ती[3] । जपक चळले नेणों किती । अबद्ध नामाच्या नामोक्तीं । अबाध कीर्ति वाल्मीकाची ॥६८॥ अबद्ध नामें नारदोक्ती । मारा मारा या वचनोक्तीं । रामनामीं लागली वृत्ती । पापनिष्कृति वाल्मीकाची ॥६९॥ करितां अबद्ध[4] नामपठन । वाल्मीक उद्धरला आपण । वदला शतकोटी रामायण । कथा पावन शिववंद्य ॥७०॥ ते देखतां श्रीराममूर्ती । हर्षें विरे चित्तवृत्ती । आनंद ओसंडेचि त्रिजगतीं । हे स्वरूपस्थिति श्रीरामाची ॥७१॥ रामनामीं अभेदस्थिती । यालागी जड उद्धरती । राम केवळ ब्रह्ममूर्ती । आद्यशक्ती ते सीता ॥७२॥ ते सीतेची उत्पत्ती । ते मी सांगेन पूर्ववृत्ती । जे म्या ऐकिली नारदोक्तीं । तेचि तुम्हांप्रति सांगेन ॥७३॥

पद्माक्षराजाचे अनुष्ठान : पूर्वीं पद्माक्षराजा अति पावन । त्याणें करोनि अनुष्ठान । रामा केली सुप्रसन्न । माझें कन्यारत्न तूं होईं ॥७४॥ येरी म्हणे गा नृपनाथा । मज न घडे जन्मकथा । भगवंतीं अन्वयो[5] न लाभतां । जाण तत्वतां नरवर्या ॥७५॥ ऐसें ऐकोनियां वचन । रायें धरूनि दृढ ध्यान । भगवंत केला सुप्रसन्न । मागे वरदान कन्यार्थी रमा ॥७६॥ विषयांचिये विषयपुष्टी[6] । रमा गोड प्रथमदृष्टीं । लक्ष्मी विमुख जालिया पाठी । दु:खकोटी श्रीमंता ॥७७॥ लक्ष्मी आलिया जें सुख । सुख नव्हे तें केवळ दु:ख । सुख मानिती ते केवळ मूर्ख । जाण निष्टंक नृपनाथा ॥७८॥ राजा म्हणे श्रीहरी । रमा खेळे मांडीवरी । ऐसीच मज कृपा करीं । म्हणोनि निर्धारीं धरिले पाय ॥७९॥

विष्णूकडून वरप्राप्ती : ऐसें रायाचें मनोगत जाण । जाणोनियां विष्णू आपण । देता जाला मातुलिंग[7] पूर्ण । येणें कन्या जाण पावसी रमा ॥८०॥ तें मातुलिंग द्विधा करिता । कन्या देखिली अतिरूपता । रायासी उपजली ममता । माझी दुहिता म्हणोनी ॥८१॥ पद्माक्षाचें घरीं जन्म । यालागीं पद्मावती हें नाम । तिचें रूप देखोनि उत्तम । उल्लास परम रायासी ॥८२॥ जन्मली मातुलिंगाप्रती । तीं दोनीं शकले एक होतीं । तेंचि मातुलिंग शक्तीच्या हातीं । स्वयें सप्तशती बोलत ॥८३॥

पद्मावतीविवाह, भयंकर रणकंदनातून सर्वनाश : कंन्या सर्वांगमनोहर । रूपें अत्यंत सुंदर । सर्वेचि जाली उपवर । तिसी नृपवर भाळले ॥८४॥ कन्या स्वयंवरायोग्य । रायें विवाह आरंभिला सांग । भाळोनि[8] आले ऋषिवर्ग । योग्यता योग्य मिरविती ॥८५॥ आले देव दानव मानव । नर किन्नर गंधर्व । राजे पावले सर्व । दैत्यसमुदाव बळेंसीं ॥८६॥ कन्या देखोनि रूपस । सवेग पावले राक्षस । स्वरूप देखोनि बहुवस । अति कर्कश संग्रामा ॥८७॥ रायें पण केला क्षोभदृष्टीं । आकाशाची सुनीळ उटी । ज्याचे आंगीं शोभे गोमटी । त्यासी हे गोरटी वरील ॥८८॥ पण ऐकोनि दुर्धर । क्षोभले अवघे सुरासुर । कन्याहरणार्थ तत्पर । जाले नरवीर सन्नद्ध[9] ॥८९॥ धरूं धांवलें यक्ष राक्षस । देखोनि क्षोभला पद्माक्ष । बाणीं साधोनियां

शब्दार्थ – १. नांगराच्या, २. पूर्वकथा, ३. पठणाने, ४. असंबद्ध, ५. संबंध, ६. विषयांच्या वाढीसाठी, ७. महाळुंगाचे फळ, ८. भुलून, ९. तयार, सज्ज.

लक्ष । विपक्षपक्ष[1] त्रासिला ॥९०॥ घायीं त्रासिलें निशाचर । रायें पळविलें संभार । आकाश लंघिती सुरवर । दैत्यीं दुर्धर युद्ध केलें ॥९१॥ तेही पळविलें दैत्यगण । रायासी खडतरले बाण । तेणें रणांगणीं प्राण । सांडिला आपण क्षात्रवृत्तीं ॥९२॥

पद्मावतीची अग्नीत उडी आणि बाहेर आगमन : जाली रणाची निरवडी[2] । कन्या धरितां तांतडीं । तिणें उठोनि लवडसवडी[3] । अग्निमाजी उडी घातली ॥९३॥ नोवरी नव्हेचि प्राप्त । राक्षस क्षोभले अत्यद्भुत । घरें पाडोनिया समस्त । नगर उपहत[4] तिहीं केलें ॥९४॥ सुरनरां असुरां कंदन[5] । करोनि रायें दिधला प्राण । राणियां केलें सहगमन । लक्ष्मी तें विघ्न श्रीमंतांसी ॥९५॥ प्रतिपाळिते प्राणा मुकले । अभिलाषिते रणीं पडिले । उरले ते रडत गेले । लक्ष्मीचें केलें असें आहे ॥९६॥ ते आदिशक्ति नोवरी । निघाली अग्निकुंडाबाहेरी । तंव बाहेर भोंवलीं बोहरी । मग कुंडाच्या तीरीं एकाएकी बैसे ॥९७॥

तिला नेण्याचा रावणाचा प्रयत्न, पुन्हा अग्निप्रवेश : विमानीं विचरतां रावण । त्यासी प्रधान सांगे सारण । जियेलागीं जालें रणकंदन । ते हे जाण नोवरी ॥९८॥ इसी धरूं जातां सुरासुरीं । उडी घातली अग्निमाझारी । ती हे निघोनि बाहेरी । कुंडाच्या तीरीं बैसलीसे ॥९९॥ तिचें देखोनि बरवेपण । रावण अभिलाषी संपूर्ण । धरूं जातां आपण । अग्निप्रवेशन नोवरीयें केलें ॥१००॥ तंव रावण बोले हासोनि । अग्निमाजी तुझी लपणी । ते सुरवर नेणती कोणी । तरी मी शोधूनी धरीन आतां ॥१॥

कुंडात पंचरत्नप्राप्ती : तेथें अति क्षोभें रावण । कुंड विझवी आपण । शोधितां नोवरी न लभे जाण । तेथे पंचारत्नें जाण सांपडली ॥२॥ त्या रत्नांची पाहतां शोभा । लपोनि जाय सूर्यप्रभा । महातेजाचा निजगाभा । रावण उभा विस्मित ॥३॥ सावध करोनियां निजमना । मग तयां दिव्यरत्नां । करोनियां अतियत्ना । चढोनि विमाना लंकेसी आला ॥४॥ तीं रत्नें अति गोमटीं । मंदोदरीस द्यावया भेटी । ते देव्हारां ठेवोनि पेटी । आपण उठाउठीं सेजारां[6] आला ॥५॥ स्त्रियेसी सांगे गुह्य गोष्टी । रत्नें अत्यंत गोमटीं । तुज शोभती कंठीं मुकुटीं । ते देव्हारां पेटी ठेविलीसे ॥६॥ ते पेटी तिसी उचलितां । नुचलेचि पैं सर्वथा । रावणे उपहासोनि कांता । आपण तत्वतां उचलूं आला ॥७॥ त्यासी उचलितां विसां हातीं । नुचलेचि पैं सर्वशक्तीं । बळाची मावळली गती । रावण चित्तीं चळकांपे ॥८॥ तेथें मिनले[7] प्रधान । वेगें आले सुहृज्जन[8] । पेटीमाजी कोण निधान[9] । काढोनि आपण पाहूं गेला ॥९॥

रत्नपेटी उघडताच तेजस्वी कन्यादर्शन : ते उघडतांचि पेटी । तेजें झांकल्या त्यांच्या दृष्टी । अनर्घ्यरत्न कन्या गोमटी । देखोनि गोरटी साशंकित ॥११०॥ सावध होवोनि लंकानाथ । कन्येचा सांगे पूर्ववृत्तांत । मंदोदरी म्हणे हे कृत्या निश्चित । करावया कुळघात कां आणिली ॥११॥ पाळितां निर्दाळिली पिता जननी । सुरासुर भुलोनि निमाले रणीं । दानवमावनांच्या[10] श्रेणी पडिल्या रणांगणीं इचेनि ॥१२॥

रत्नपेटी भूमीत पुरण्याविषयी मंदोदरीचा सल्ला : भविष्य बोले मंदोदरी । हे प्रतिपाळित्यातें संहारी । उद्यां आपणा भोंवडील बोहरी । हे राष्ट्राबाहेरी सांडावी ॥१३॥ इचा करिता बाळघात । आतांचि उपजेल अनर्थ । हे न ठेवावी राज्यांत । त्यागावी निश्चित राष्ट्रांतरीं[11] ॥१४॥ आतांचि हे इची पेटी । रावण नुचलवे संकटीं । इसी मारितां कडकडाटीं । अनर्थ कोटी होईल ॥१५॥ अचेतन खांब हाणितां लाथा । हरिण्यकशिपु पावला घाता । येथेंही

शब्दार्थ - १. शत्रुसमुदाय, २. अखेर, ३. चपळतेने, ४. उध्वस्त, ५. नाश, ६. शयनमंदिरात, ७. एकत्र झाले, ८. आप्त, ९. अपूर्व लाभ, ठेवा, १०. पंक्ती, समूह, ११. अन्य राज्यात.

होईल तेचि कथा । इसी तत्वतां त्यागावें ॥१६॥ वचन मानलें लंकानाथा । युक्ति मानली समस्तां । पेटी त्यागावया सर्वथा । सवेग दूतां बोलावी ॥१७॥ कन्यात्यागा शीघ्रवंत । विमान आणिलें त्वरित । मंदोदरी दूतांसी सांगत । हे पेटी भूमिगत करावी ॥१८॥ प्रकट पेटी ठेवाल जेथें । तत्काळ अनर्थ उपजेल तेथें । यालागीं करावी भूमिगत । अति गुप्त निक्षेप ॥१९॥ जो गृहस्थाश्रमी ब्रह्मचारी । हे वाढेल त्याचे घरीं । जो आत्मत्वें वर्तेल चराचरीं । त्याच्या घरीं नांदेल ॥१२०॥

**पेटीतून प्रकटलेली भविष्यवाणी :** पेटी घालितांचि विमानीं । तियेमाजी उठली ध्वनी । मी मागुतीं येईन लंकाभुवनीं । राक्षसदहनीं दहनार्थ ॥२१॥ माझें करितांचि अभिलाषण । रावणासी येईल मरण । माझें निमित्त संपूर्ण । निर्दळण राक्षसां ॥२२॥ ऐसा ऐकतांचि शब्द । रावण झाला अति स्तब्ध । राक्षस धाकती सुबद्ध[1] । भविष्य विरुद्ध ऐकोनि ॥२३॥ दूतीं पेटी घालोनि विमानीं । पाहत पाहत आले या वनीं । विदेहाची[2] सीमा[2] लक्षूनी । पेटी निक्षेपूनी ते गेले ॥२४॥

**जमीन नांगरताना ब्राह्मणाला पेटीची प्राप्ती, त्यावरील मालकीसंबंधी चर्चा :** तें भूमि जनकें धर्मार्थीं द्विजासी दिधली क्षेत्रवृत्ती[3] । तोही नांगर धरावया शेतीं । अति निगुतीं मुहूर्त पाहे ॥२५॥ वेळ साधोनि सुमुहूर्तीं । नांगर धरिताचि शेतीं । प्रथम तासाचे उपहती । फाळाच्या दांती पेटी लागली ॥२६॥ द्विजासी सांग क्षेत्रदूत[4] । धन्य धन्य तुझा सुमुहूर्त । पीक पिकलें अद्भुत । निधि निश्चित पहा स्वामी ॥२७॥ द्विजें पेटी देखतांचि जाण । म्हणे गुप्त ठेवा तें राजधन । मज क्षेत्र[5] दिधलें दान । ठेवा आपण घेऊं नये ॥२८॥ ते पेटी घेवोनि हातीं । द्विज आला राजसभेप्रती । हा गुप्त ठेवा होता तुमचें शेतीं । तो त्वां भूपति घेईजे स्वयें ॥२९॥ राजा बोले धर्मवचन । तुम्हांसी दिधले भूमिदान । तेथील जें धनधान्य । तें ब्रह्मार्पण द्विजवर्या ॥१३०॥ द्विज धर्मार्थी अति प्रवीण । मज समर्पिलें क्षेत्र दान । नाहीं दिधलें गुप्तधन । हें मी आपण स्पर्शेना ॥३१॥ धनलोभ नाहीं द्विजा । धनलोभ नाहीं भूभुजा[6] । परम संकटीं पडिला राजा । हें साधुसमाजा कळों आलें ॥३२॥ तेथें साधु बोले वचन । यामाजी कोण आहे धन । तें काढोनि पहावें आपण । मग शास्त्राविधान विचारूं ॥३३॥ ते उघडितांचि पेटी । सौंदर्याची दीप्ती दृष्टीं । कन्या देखिली गोरटी । आश्चर्य पोटीं सर्वांच्या ॥३४॥ कन्या दृष्टीं देखतांची देख । डोळियां लागली टकमक । विस्मयें दाटले सकळिक । अलोलिक सौंदर्य ॥३५॥

**पेटीतील कन्येचा जनकाकडून स्वीकार :** देखोनि लावण्यनिधान । जनकें उचलिली आपण । म्हणे हें माझें कन्यारत्न । भेरी निशाण त्राहाटिलें[7] ॥३६॥ गगन गर्जे मंगळतुरीं[8] । सभा गर्जे जयजयकारीं । शांतिपाठ पढिजे ऋषीश्वरीं । वेदोक्तमंत्रीं अभिव्यक्त ॥३७॥ जनकें पाळिली म्हणोनि जनकात्मजा । धरेनें[9] राखिली अति ओजा[10] । यालागीं म्हणती धरणिजा । परी ते अयोनिजा जगदंबा ॥३८॥ नांगर वाहतां लागली दांतीं । सीता जन्म पावली शेतीं । ते सांगितली पूर्वस्थिती । हे नारदोक्ती यथार्थ ॥३९॥ सीतेचें जन्मलक्षण । यासी मूळ स्कंदपुराण । कालिकाखंडीं हें निरूपण । समूळ संपूर्ण लिहिलेंसे ॥१४०॥ अहल्येचा ज्येष्ठ सुत । जनकाचा जो पुरोहित । शतानंदस्वामी समर्थ । तेणें हा वृत्तांत सांगितला ॥४१॥ सांगितली सीतेची उत्पत्ती । आतां सीतास्वयंवरार्थी । जनकासी हरचापप्राप्ती[11] । झाली कैशा रीतीं तें एका ॥४२॥ एकाजनार्दना शरण । जालें सीताजन्मकथन । पुढें हरचापप्रकरण । सज्जनीं सावधान परिसावें ॥१४३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां जानकीजन्मकथा नाम पंचदशोऽध्याय ॥१५॥ श्लोक ॥२॥ ओंव्या ॥१४३॥

---

शब्दार्थ - १. अतीव, २. जनकाची नगरसीमा, ३. शेतीसाठी, ४. शेतातील सहायक, ५. शेत, ६. राजाला, ७. वाजविले, ८. मंगलवाद्यांनी, ९. पृथ्वीने, १०. आपुलकीने, काळजीने, ११. शिवधनुष्याच्या लाभ.

# अध्याय सोळावा

## परशुरामांचा प्रताप

श्रीरामचंद्राय नमः । सीतास्वयंवरासी जाण । शिवचापासी लावला गुण[1] । हा जनकें करावया पण । काय कारण तें ऐका ॥१॥

शिवधनुष्याचा पण करण्याचे कारण : पूर्वी परशुराम कैलासीं । धनुर्विद्या शिवापाशीं । परशुविद्या गणेशापाशीं । लघुलाघवेंशीं शिकला ॥२॥ परशुराम कैलासीं । राहिला असे शिवसेवेसी । तत्परता अहर्निशीं । श्रद्धा गणेशीं समसाम्य ॥३॥ तवं आक्रंदे आत्यंतिक । ऐकिली रेणुकेची महाहाक । परशुरामें एकाएक । ऐकोनि सांशक तो जाला ॥४॥ येवोनि सांगे शिवापाशीं । रेणुका बोभात[2] आक्रंदेशीं । आज्ञा पुसतों स्वामींसी । मज मातेपासीं जावया ॥५॥

रेणुकेची कथा : ऐका रेणुकापुराण । जें कां अति पावन । दोष नासती दारुण । कथा श्रवण करितांची ॥६॥ ऐकतांचि तें वचन । रुद्र जाला कोपायमान । जगीं अधर्म वाढला पूर्ण । दानवीं ब्राह्मण वधिला दर्पे ॥७॥ शिव म्हणे जामदग्न्या[3] । मी तुज प्रसन्न सर्वज्ञा । वेगीं दुष्ट वधीं प्रतिज्ञा । विद्यासंपन्ना परशुरामा ॥८॥ त्यासी देवोनि निजत्र्यंबक[4] । निर्दाळीं[5] म्हणे ब्रह्मघातक । क्षत्रिय श्रीमदें उन्मादक । तेही एकेंएक निर्दाळीं ॥९॥ या त्र्यंबकाच्या बाणीं । निःक्षत्रिय करीं धरणी । गणेशें परशु देवोनी । परशुपाणि[6] पाठविला ॥१०॥ तैंपासुनी परशुरामाभिधान । वरद गणेशाचें पूर्ण । ज्या कार्या प्रवर्तसी जाण । तें निर्विघ्न करीन मी ॥११॥ वेगीं येतां परशुरामासी । मार्गी भेटले आश्रमवासी । तिहीं सांगितलें त्यांपासीं । अति कदनेंसीं[7] पितृघात ॥१२॥ परशुरामें केला प्रश्न । पितृघाता काय कारण । त्या विग्रहाचें[8] मूळ कथन । आश्रमींचे जन सांगती ॥१३॥

जमदग्नींच्या वधाचे कारण : सहस्रार्जुन वनक्रीडेसी । आला जमदग्निआश्रमासी । रेणुका प्रार्थोनिया पतीसी । राजा कटकेंसीं निमंत्रिला ॥१४॥ ऋषि म्हणे राजासी केवळ । आणोनि घालू फळमूळ । जी म्हणे आश्रमधर्म विकळ । अन्नें सकळ तृप्त कीजे ॥१५॥ आश्रमा आले ते ते अतीत । तृप्त करावे समस्त । तुम्हीं सामर्थ्यें अति समर्थ । विकळ परमार्थ न करावा ॥१६॥ याची मात्र कामधेनु । आणोनि द्यावें दिव्यान्न । राजा विभूति श्रीभगवान । यथोक्त पूजन करावें त्याचें ॥१७॥

रेणुकेच्या सांगण्यावरून सहस्रार्जुनाला मेजवानी : निजपत्नीचें धर्मवचन । ऐकोनि ऋषि सुखायमान । मग कामधेनू लागून । विजनीं[9] अनुष्ठान आरंभिलें ॥१८॥ रायें पाहों पाठविलें दूतांसी । अन्नसिद्धि केली ऋषीं । तंव वैश्वानर[10] नाहीं चुलीसीं । पाकाची कायसी कथावार्ता ॥१९॥ त्या ऋषींची ऋषिकांता । वदान्य[11] अति उदारता । नवल तिची अगाधता । चित्तीं चिंता असेना ॥२०॥ ते ऋषिपत्नी राजबाळा । विचित्र घालिते रंगमाळा । राजपूजेचा सोहळा । अति आगळा उत्साह ॥२१॥ राजदूत गेले परतोन । तंव ऋषीनें आणिली कामधेनु । तेणें रेणुकेचे हातीं देवोन । राजभोजन संपादी ॥२२॥ मज न सोसे खटपट । राजोपचार अति चोखट । जें जें मागसी वरिष्ठ । तें तें यथेष्ट देईल धेनु ॥२३॥ धेनु प्रसवली कृपासंतुष्टीं । पहिले एक ताट देखिलें दृष्टीं । त्याचि ताटाच्या पोटीं । ताटें कोट्यनुकोटी प्रसवलीं ॥२४॥ ऋषीनें सांडिला निजकोप । त्यासी नाहीं संकल्प विकल्प । लौकिकक्रियाखटाटोप । नाहीं साटोप तयासी ॥२५॥ राजभोजनकर्तव्यता । घातलें रेणुकेच्या

---

शब्दार्थ - १. दोरी, २. ओरडत आहे, ३. परशुरामा, ४. आपले धनुष्य, ५. नाहीसे कर, ६. परशुराम, ७. मोठी मारामार करून, ८. भांडणाचे, ९. एकांतात, १०. अग्नी, ११. उदार.

माथां । पुढें काय वर्तली कथा । सावधानता अवधारीं ॥२६॥

जमदग्नीने क्रोधत्याग का केला? : कोणा कार्यार्थ जमदग्नीने । कोप सांडिला आपण । ऐसा श्रोतीं केला प्रश्न । तेही कथन अवधारा ॥२७॥ ब्रह्मांडखंडपुराणीं । वदली मार्कंडेयाची वाणी । तेचि कथा निरूपणीं । साधुसज्जनीं परिसावी ॥२८॥ वध करावया सहस्रार्जुनासी । इंद्र आला जमदग्नीपासीं । धरोनियां दीन वेषासी । अति तृष्णेसीं तृषित ॥२९॥ पाहोनियां विहित काळ । साधून अतिथीची वेळ । मागों आला जी तत्काळ । केवळ जळ ऋषीपाशीं ॥३०॥ तोंड कोरडें पैं जालें । दोनी ओंठ पैं वाळून गेले । कांही न बोलवे बोलें । कराग्रीं दाविलें उदकासी ॥३१॥

रेणुकेची संभ्रमावस्था : ऋषि म्हणे रेणुकेसी । शीघ्र उदक देईं अतिथीसी । येरी जाणोनि कपटवेषासी । निजमानसीं शंकली ॥३२॥ मज यासी देतां उदक । हा करील कडु विख । ऋषि कोपेल आत्यंतिक । जीवीं धुकधुक लागली ॥३३॥ अतिथी छळील उदक देतां । जमदग्नि कोपेल न देतां । थोर ओढवली संकोचता । कांही कर्तव्यता स्मरेना ॥३४॥ जमदग्नि अति समर्थ सर्वज्ञ । जाणे आश्रमधर्मसंरक्षण । हातींचें अग्रोदकजीवन । करवी प्राशन अतिथीसी ॥३५॥ जमदग्नीनें आपण । करविलें अतिथीसी उदकपान । रेणुका म्हणे मीं छळिलें पूर्ण । विघ्न दारुण मज आलें ॥३६॥ कोपें ऋषि म्हणे रेणुकेसी । तूं केवळ कृत्या कर्कशी । उदक न देवोनि अतिथीसी । पतिवचनासी पराङ्मुख[1] ॥३७॥ चोर चांडाळ कपटेवेषी । आश्रमा आला समयासी । जें जें मागेल तें तें त्यासी । अवश्यतेसीं अर्पावें ॥३८॥ केवळ निमोल उदक । नेदूनि झालीस विमुख । जळे तुझें काळें मुख । तुझें सुख मज नाहीं ॥३९॥ गृहिणीस्तव[2] गृहस्थाश्रम । ते जैं पाळीना आश्रमधर्म । तिचा मग कोण संभ्रम । अति दुर्गम कोपला ॥४०॥

रेणुकेचा वध करण्याची जमदग्नीची आपल्या मुलांना आज्ञा : कोप नावरे ऋषीसी । पाचारोनियां पुत्रांसी । वेगीं तुम्ही वधा इसी । ममाज्ञेसी अति शीघ्र ॥४१॥ पुत्र म्हणती स्वामिनाथा । जैसा पिता तैसीच माता । आम्हांसी वध्य[3] नव्हे सर्वथा । हें तत्वतां विचारिजे ॥४२॥ पुत्र न मानिती पित्याचें वचन । पांचही तुम्ही समसमान । आत्तांचि जावोनि प्राण । प्रेतत्व पूर्ण पावाल ॥४३॥ ऐसें ऐकतां ऋषिभाषण । तत्काळ ते पांचही जण । प्रेतत्व पावले संपूर्ण । ऋषिभयें प्राण पळाले ॥४४॥ प्राण म्हणती आयुष्य असतां । आम्हांसी जावों नये म्हणोनि राहतां । तैं ऋषिशाप बैसेल माथां । तेणें धाकें तत्वतां पळाले प्राण ॥४५॥ ऋषिभयें पळालें प्राण । प्रेतत्व पावले पांचही जण । तरी ऋषीचा कोप दारूण । क्षोभलेपण[4] सांडीना ॥४६॥ तेचि समयीं परशुधर । सुमनें घेवोनि आला सत्वर । ऋषीस केला नमस्कार । त्यासही दुर्धर आज्ञापी ॥४७॥ करीं रेणुकेच्या घाता । येरें तत्काळ छेदिला माथा । तेणें आल्हाद ऋषीचिया चित्ता । प्रसन्नता संतुष्ट ॥४८॥

पित्राज्ञा पालनामुळे परशुरामास वरदान : ऋषि गर्जे प्रसन्नता । मागसी तें देईन आतां । रामें चरणीं ठेविला माथा । विनंति स्वामिनाथा अवधारीं ॥४९॥ माझी उठवावी हे माता । बंधूंची दवडावी निजप्रेतता । हेंचि मागतों गुरुनाथा । दिल्हें तत्वतां ऋषि म्हणे ॥५०॥ तुझा लागतांचि हात । बंधू प्रेतत्वा होती निर्मुक्त । चेतनासुखें सावचित्त । यथास्थित वर्तती ॥५१॥ रेणुकेचीं दुखंडें[5] । तुझेनि हातें होती अखंडें । शांतिसुखाचेनि सुरवाडें[6] । वाडेंकोडें[7] उठतील ॥५२॥ म्यां छेदिली निजमाता । हें नाठवो मातेच्या निजचित्ता । ऐसी मज द्यावी वरदता । चरणीं माथा ठेविला ॥५३॥ तुझें नाठवे छेदिलेपण । अंगीं घायाचे न दिसती वण । निद्रेपासून उठिली

शब्दार्थ – १. विमुख, पाठमोरी, २. पत्नीमुळे, ३. मारण्यास योग्य, ४. क्रोध, संताप, ५. दोन तुकडे, ६. वैफल्याने, ७. आनदांने.

आपण । तैसें लक्षण पावेल ॥५४॥ ऐकोनि पित्याचें वरद भाषण । पुढती पित्याचे वंदोनि चरण । करावया मातेचें उद्धरण । हर्षे संपूर्ण उठिला ॥५५॥ रेणुकेच्या छेदाच्या अंतीं । तिसी भेटों आली आदिशक्ती । तूं जन्मलीस ज्या कार्यार्थी । कां तदर्थी उदास[1] ।॥५६॥ तुवां वधावा सहस्रार्जुन । हें तूं गेलीस विसरून । त्याची द्यावया आठवण । इंद्रें आपण तुज छळिलें ॥५७॥ रेणुका म्हणे कार्यसिद्धी । साधावी लागेल गुह्यबुद्धी । कळोंनेदावें जनापवादीं । विरोधसंधि लक्षेना ॥५८॥ कळां न द्यावें पैं जनीं । कळों न द्यावें जमदग्नी । ऐसें मज लक्षितां अनुदिनीं । विरोधकरणी लाधेना ॥५९॥ तंव बोलिली आदिशक्ती । परशुरामाची वरदोक्ती । तूं पावसी देहप्राप्ती । येचि कार्यार्था साधावया ॥६०॥ रेणुका बोलली वचनोक्ती । तूंचि कार्य तूंचि कर्ती । मज सांगसी जैसी युक्ती । त्या त्या गती साधीन ॥६१॥ जगदंबा सांगे रेणुकेसी । सहस्रार्जुन पारधीसी । येईल तुझ्या आश्रमासी । तैं कार्यसिद्ध्यर्थी पूजावा ॥६२॥ सकळ सैन्येंसीं नृपती । निमंत्रवीं ऋषिहातीं । कामधेनु आणावी तदर्थी । ऋषिप्रती सांगोनी ॥६३॥ दुर्लभ उपचार त्रिजगतीं । तें ते मागून धेनूप्रती । साधावया निजकार्यार्थी । आदरें नृपति पूजावा ॥६४॥ करितां दोन्ही शक्ती भाषण । तंव परशुरामें आपण । लाहोनि पित्याचें वरदान । केलें सावधान मातेसी ॥६५॥ परशुरामें लावितां हात । बंधु जाले सावचित । ते नेणती मातेचा घात । तिसीही निजघात नाठवे ॥६६॥ पुत्र सोडविले शापापासून । रेणुकेसी आल्हाद पूर्ण । परशुरामातें आलिंगून । वदे वरदान रणविजयीं ॥६७॥ रामें ऐकतां ते वरद गोष्टी । दृढ बांधिली शकुनगांठी ॥ पुढील कथेची परिपाटी[2] । सावध दृष्टीं अवधारा ॥६८॥

**जमदग्नीकडून क्रोधनिंदा :** स्त्रीपुत्र जालिया सावधान । जमदग्नि जाला अति उद्विग्न । केवढें क्रोधाचें विंदान । अंध:पतनदायक ॥६९॥ स्त्रीपुत्रांचा करितां घात । मज होतें अध:पतन येथ । धन्य धन्य परशुराम सुत । अति अनर्थ चुकविला ॥७०॥ माझें घेवोनि वरदान । माझें चुकविलें अध:पतन । क्रोधें ठकविलें मज संपूर्ण । त्याचें निर्दळण मी करीन ॥७१॥ क्रोध म्हणिजे केवळ मांग । तो मजमाजि वसे सांग । जळो माझा योग याग । क्रोध डाग अपवित्र ॥७२॥ क्रोधाएवढा महावैरी । बैसला असतां जिव्हारीं । जो ज्ञानाची मानी थोरी । तो संसारीं महामूर्ख ॥७३॥ अल्प अन्याय देखिल्यावरी । त्यावरी जो तो कोप करी । क्रोधाएवढा अपकारी । क्रोध क्रोधावरी न करिती ॥७४॥ क्रोध अपराधाची थोरी । अतर्क्य रिघोनि जिव्हारीं । चहूं पुरुषार्थांची करी बोहरी । नानापरी विभांडी[3] ॥७५॥ क्रोध आलिया कडकडाडी । काम पळे उठाउठीं । धर्म जाय बारा वाटीं । क्रोधें तुटी अर्थस्वार्था ॥७६॥ क्रोध रिघोनि अंतरीं । मुख्य मोक्षा जीवें मारी । ऐसा क्रोध पैं निजवैरी । तो मी संहारीन पैं सत्य ॥७७॥ ऐसें बोलोनि ऋषि आपण । दृढ घालोनि आसन । आवरोनि प्राणापान । क्रोधदहन करूं पाहे ॥७८॥

**क्रोधाची दर्पोक्ती :** क्रोध म्हणे ऋषि विचारीं । मज निघाल्या देहाबाहेरी । वृथा जाईल तुझी थोरी । तृणावारीं[4] न पुसती ॥७९॥ ऐक माझे वस्तीची थोरी[5] । म्यां प्रवेशोनि नृसिंहशरीरीं । हिरण्यकशिपूयेवढा वैरी । नखाग्रीं निवटला ॥८०॥ म्यां शिवरूपीं घालोनि ठाणें । त्रिपुर निवटला एक्या बाणें । माझेनि योगें त्रिनयनें[6] । जीवें मारणें जालंधर ॥८१॥ म्यां रिघोनि विष्णुदेहीं । मधुकैटभ मारिले ठायीं । म्यां संचरोनि कुमाराच्या देहीं । मर्दिला पाहीं लवणासुर ॥८२॥ ऐसें माझेनि योगें जाण । देवांहीं केलें दुष्टनिर्दळण । विचारीं ऋषिराया तूं आपण । मजविण तूं तृणप्राय ॥८३॥ तूं मज दवडिल्या ऋषी । तुझी दशा होईल कैसी । ते मी सांगेन तुजपासीं । सावधानेंसीं अवधारी ॥८४॥ मज निघाल्या देहाबाहेरी । बाइला घेती

---

**शब्दार्थ -** १. निरपेक्ष, निष्काळजी, २. परिनालिका, क्रम, ३. पराभव करतो, ४. गवतासमान होऊन, ५. माझ्या राहण्याचा थोरपणा, ६. शंकराने.

टोलेवारी । तुज मारिल्या तोंडावरी । साटोप[1] शरीरीं तुज नाहीं ॥८५॥

क्रोधाला जमदग्नीचे उत्तर : ऐसी ऐकोनि त्याची कथा । कोपावरी अति क्षोमता । पूर्ण बाणली[2] ऋषि नाथा । तुज मी आतां मारीन ॥८६॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामक्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥१॥

भगवंताचिया वाक्यथोरी । काम क्रोध लोभ ज्याचे शरीरीं । त्याची वस्ती नरकाभींतरीं । त्याच्या घरीं नित्य नरक ॥८७॥ नरका जाणें न लगे त्यासी । तोचि स्वयें नरकरासी । क्रोधा तुझी गति ऐसी । व्यर्थ जल्पसी वाढिवा[3] ॥८८॥ क्रोध कामाचा कैवारी । क्रोध अभिमानाचा साहाय्यकारी । क्रोध लोभा सबाह्याभ्यंतरीं[4] । पापकारी निजक्रोध ॥८९॥ क्रोध संचरल्या[5] देहीं । अणुमात्र हित नाहीं । पापाच्या कोटी पाहीं । क्रोधाच्या पायीं तोडरी[6] ॥९०॥ ऐसें बोलोनि जमदग्नी । चेतवूं पाहे जंव योगाग्नी । तंव क्रोध निघाला गजबजोनी । देह त्यागूनी ऋषीचा ॥९१॥ क्रोध म्हणे ऋषिनाथा । तुझी आज्ञा वंदोनि माथां । मी निघालों जी तत्वतां[7] कोठे आतां म्यां राहावें ॥९२॥ ऋषि होय विचारिता । माझ्या क्रोधाची[7] दुर्धरता । यासी वस्ती न दिसे सर्वथा । म्यां काय आतां सांगावें ॥९३॥

क्रोध स्वीकारण्याची परशुरामाची तयारी : ऐसी जगदग्नी करितां चिंता । परशुधरा कळलें तत्वतां । चरणीं ठेवोनियां माथा । होय बोलता अति नम्र ॥९४॥ स्वामीचा कोप अति दारुण । हा सर्वत्र करील दहन । यासी करावें मदर्पण । कृपा करोनि स्वामिया ॥९५॥ जमदग्नि विचारी आपण । माझ्या क्रोधा अति सांठवण। परशुधर शुद्ध संपूर्ण । हा रामार्पण करावा ॥९६॥

क्रोधाची साधकबाधकता : ऋषि सांगे नित्यब्रह्मचारी । धनलोभ नाहीं ज्याभीतरीं । जो द्विजांचा द्वेष न करी । क्रोध त्यामाझारी शांतत्वें वसे ॥९७॥ याहूनि अन्यथा पैं होतां । क्रोध करीत त्याच्या घाता । जरी तुज टाकेल तत्वतां । तरी मी आतां अर्पीन ॥९८॥ द्रवदारलोभ ज्यापासीं । क्रोध तेथें सदा मुसमुसी । ज्ञानगर्व ज्याचे मानसीं । क्रोध त्यापासीं चाविरा[8] ॥९९॥ ज्ञानगर्व द्रव्य दारा । इहीं द्वारीं क्रोधाचा मारा । हे जिंकिलिया परशुधरा । क्रोध कामारा तयाचा ॥१००॥

परशुरामांचा क्रोधाचा स्वीकार : परशुराम म्हणे ताता । तुझे चरणींचें तीर्थ घेता । तेणें तीर्थें मज सामर्थ्यता । क्रोध राखता भय नाहीं ॥१॥ पित्यासी करोनि नमन । घेतलें चरणतीर्थ प्रार्थून । तेणें तीर्थेंसी आपण । केलें प्राशन क्रोधाचें ॥२॥ क्रोध बोलिला आपण । भार्गवा[9] करितां दुष्टनिर्दळण । संग्रामीं साहाय्यकारी आपण । तुज मी होईन भृगुवीरा ॥३॥ परशुराम जंव क्रोध घोटी । अंगीं बाणलो पुष्टि तुष्टी । चौंगुणीं वाढीव पोटीं । संग्रामी लाठी वीरवृत्ति ॥४॥ करितां क्रोधाचे प्राशन । परशुरामासी समाधान । अंगी बाणली आंगवण[10] । दुष्टनिर्दळण[11] करावया ॥५॥ क्रोध त्यागिला जमदग्नीनें । त्याचें सांगितलें निरूपण । एकाजनार्दना शरण । कथानुसंधान अवधारा ॥६॥

सहस्राजुनाचे आतिथ्यवर्णन : कामधेनु आणोनि ऋषीं । स्वयें दिधली रेणुकेपासीं । तिणें पूजोनि धेनूसी । राजोपचारासी मागितलें ॥७॥ जे रायें देखिलेना ऐकिले । जे रायें नाहीं चाखिले । ते ते उपचार भलेभले । धेनूनें दिधले तत्काळ ॥८॥ दिव्यान्नें लेणीं लुगडीं । एके ताटें प्रसवली आवडीं । निघालीं ताटे लक्षकोडी । निघाल्या चवडी[12] ताटांच्या ॥९॥ राजदूत सांगे रायापासीं । अन्नसामग्री कैंची ऋषी । वैश्वानर नाहीं चुलीसी । कथा कायसी पाकाची ॥११०॥ रायें पाठविला प्रधान । आश्रमीं पाहे अन्नसदन । नसेल तरी द्यावें आपण । अन्नधन

---

शब्दार्थ - १. अहंकार, नेट, बिंबली, ३. बडिवाराने, ४. आत बाहेर भरलेला, ५. शिरल्यावर, ६. पादभूषण, ७. माझा क्रोध धारण करण्यास अत्यंत कठिण, ८. जागृत, चावरा, ९. हे परशुरामा ! १०. पराक्रम, ११. दुष्टांचा नाश, १२. ढीग.

ऋषीसी ॥११॥ ऐसें ऐकोनि वचन । ऋषिआश्रमा प्रधान । स्वयें पातला आपण । तंव ऋषि बोलावणें पाठवितु ॥१२॥ प्रधान म्हणे लागला उशीर । शिष्यवर्ग म्हणती धरा धीर । संपादिला अन्नप्रकार । आतां सत्वर चलावें ॥१३॥ प्रधानें जाणविलें रायासी । ऋषीनें पाठविलें बोलवायासी । रायें सिद्ध करोनि सर्वांसी । आला कटकेंसीं[1] भोजना ॥१४॥ आले देखोनि रायासी । ऋषि सामोरा येवोनि प्रीतीसीं । रायासी पूजिलें उपचारेंसी । मधुपर्कासी[2] सिद्ध केलें ॥१५॥ पाहती राजा आणि प्रधान । तंव दिव्य मंदिरें शोभायमान । सुवर्णताटीं दिव्यान्न । समसमान सर्वांसी ॥१६॥ ऋषीनें बैसविली पंक्ती । राजा अति विस्मित चित्तीं । धन्य ऋषीची संपत्ती । अगाध स्थितिसामर्थ्य ॥१७॥ सकल बैसले भोजनपंक्ती । मागणें नाहीं मागुती । वाढणें न लगे पुढती । अवघ्या तृप्ती एकची ॥१८॥ दिव्यालंकारभूषणें । दिव्यांबरें[3] परिधानें । सर्व गौरविले सन्मानें । अवघेही मनें विस्मित ॥१९॥ राजा म्हणे प्रधाना-प्रती । आम्ही राजे चक्रवर्ती । आम्हां ऐसी नाहीं संपत्ती । ते ऋषीप्रती कैसेनी ॥१२०॥

**पाकसिद्धी कामधेनूमुळे झाली म्हणून तिचीच ऋषीजवळ मागणी :** पुरोहित सांगे ऋषीची थोरी । कामधेनु आहे त्याचे घरीं । तिचेनि प्रभावेंकरीं[4] । दिव्य उपचारीं वर्षत ॥२१॥ ऋषीपासीं आहे कामधेनु । ऐसें ऐकता सहस्रार्जुन । ते आम्हीं घ्यावी मागून । ऐसा अभिमानु दृढ धरिला ॥२२॥ राजा म्हणे जमदग्नीसी । थोर सुखी केलें आम्हांसी । कांहींएक मागेन तुजपाशीं । तें अवश्यतेसीं मजं द्यावें ॥२३॥ ऋषि म्हणे तुम्ही राजे आत्यंतिक[5] । येरु म्हणे मी तुझा याचक । तुज मागेन कांहीएक । तें अवश्यक मज द्यावें ॥२४॥ आश्रमीं आहे कामधेनु । ते मज द्यावी कृपा करोन । वचन ऐकोनि जगदग्न । अति उद्विग्न स्वयें जाला ॥२५॥ कामधेनु स्वर्गभूषण । मृत्युलोकीं नाहीं जाण । गाय आणली इंद्रापासून । परवस्तुदान केवीं द्यावें ॥२६॥ राया तुझे पूजेचे अंतीं । धेनु न्यावी इंद्राप्रती । ऐसें करोनिया निगुतीं । आश्रमाप्रती आणिली ॥२७॥

**राजाची बळजबरी व जमदग्नीचा वध :** राजा विचारी मानसीं । बलात्कारें नेऊं धेनूसी । इंद्र येईल धांवण्यासी । शिक्षा मी त्यासी लावीन ॥२८॥ सोडावया कामधेनु । रायें धाडिला प्रधान । आड्वा राहिला जमदग्न । देदीप्यमान तेजस्वी ॥२९॥ जमदग्नीच्या तेजापुढें । प्रधान पळे मागिलीकडे । योद्धे पळाले निधडे[6] । सैन्य बापुडें तें किती ॥१३०॥ ऐसें देखोनियां जाण । राजा धांविन्नला आपण । पुढें उभा जमदग्न । तो अणुप्रमाण ढळेना ॥३१॥ ऐसें देखोनियां त्यासी । राजा मोकली[7] शस्त्रांसी । तीं लागों न शकती ऋषीसी । मग हातवसी[8] निर्वाणखडग[9] ॥३२॥ जेथें विषयाचा अति स्वार्थ । तेथें नाठवे कर्तव्यार्थ । राजहस्तें ऋषिघात । ऐसा अनर्थ ओढवला ॥३३॥ राजा अत्यंत क्रोधयुक्त । निवार्णशस्त्रे टाकित । तेणें ऋषीचा केला घात । पडिला अचेत जमदग्नि ॥३४॥ जमदग्नीनें सांडिला कोप । यालागीं त्यासी न देववे शाप । तेणें रायाचा प्रताप । शस्त्रसाटोप चालिला ॥३५॥

**रेणुकेकडून राजा मूर्च्छित :** जमदग्नीचा गेला प्राण । पळाले आश्रमींचे ब्राह्मण । राजा बोलिला आपण । आत कामधेनु आणा रे ॥३६॥ धेनु सोडूं आले सेवक । रेणुका क्षोभली आत्यंतिक । चक्र करोनियां ताटक[10] । युद्धासन्मुख ते जाली ॥३७॥ ताटंकचक्राभेणें । उठाउठी पळाले प्रधान । सेना निघे जीव घेऊन । पळालें सैन्य बारा वाटीं ॥३८॥ ताटंकचक्राची तिखट धार । निधडे पाडिले महावीर । वाहती रुधिराचे पूर । तिजसमोर कोण राहे ॥३९॥ कामधेनूतें लवलाहो । सोडूं धांविन्नला स्वयें रावो । रेणुकेनें आसुडितां बाहो । पडे सहस्रबाहो मूर्च्छित ॥१४०॥ त्या सहस्रार्जुनाचे सुत । धांविन्नले क्रोधयुक्त । तिहीं युद्ध केलें अत्यद्भुत ।

---

शब्दार्थ - १. सैन्यासह, २. दधी, धृत, जल, मध आणि साखर यांनी केलेला पूजेचा उपचार, ३. उंची वस्त्रे, ४. सामर्थ्यामुळे, ५. मोठे, श्रेष्ठ, ६. धैर्याचे, ७. सोडी, ८. हातात घेई, ९. निकराची तलवार, १०. एक कर्णभूषण.

तंव सावचित्त नृप जाला ॥४१॥ निर्वाणशस्त्रांचे घाये । राव सोडी लवलाहें । तिसी न लागती पाहें । देखोनि राव गजबजिला ॥४२॥ मज सहस्रार्जुनाचा यावा[१] । न साहवे देवां दानवां । मा[२] मनुष्यांचा कोण केवा । त्या मज लघुत्वा आणिलें स्त्रियें ॥४३॥ चामुंडास्त्राचा प्रळयघात । बळें सहस्रार्जुन हाणित । साहोनि एकवीस आघात । पडे मूर्च्छित जगदंबा ॥४४॥

कामधेनूकडून राजाचा पराभव : जमदग्निआज्ञेचें बंधन । कामधेनूसी होतें पूर्ण । ऋषि निमतांचि[३] जाण । धेनु निर्बंधन[४] स्वयं झाली ॥४५॥ रेणुका रणीं पडलियावरी । राजा धांवोनि धेनु धरी । थडका हाणोनि निघे बाहेरी । सहस्र करीं नाटोपे ॥४६॥ राजा खुरावरी हाणे घात । तेणें खुरीं निघालें रक्त । तेचि खुरासनी[५] जाले आरक्त । आले युद्धार्थ रायासीं ॥४७॥ खुरासनी पळवूनि पाहें । राजा शृंगीं हाणी घाय । जाला सिंगाळांचा[५] उद्भव । तिहीं सहस्रबाहो हांकिला ॥४८॥ आक्रंदें दे हंबरड्यासी । ते ठायीं झाले कालेमसी[५] । जन्म पावले हबसी[५] । तिहीं सहस्रबाहु हांकिला ॥४९॥

कामधेनूचे स्वर्गाला प्रयाण : इतुकें करोनियां कंदन[६] । स्वर्गा गेली कामधेन । राजा जाला अति उद्विग्न । म्लानवदन अनुतापी ॥१५०॥ म्हणे स्वार्थ ना परमार्थ । उगाच केला शस्त्रघात । मज घडला ब्रह्मघात । सद्यः[७] अनर्थ स्वलोभें ॥५१॥ राजा अनुतापी मानसीं । कांही न बोले कोणासीं । घेवोनि सकळ सैन्यासी । निजनगरासी तो गेला ॥५२॥ रणीं रेणुका मूर्च्छापन्न[८] । ती स्वयें होवोनि सावधान । ठायीं ठेवोनियां प्राण । चेतना संपूर्ण पावली ॥५३॥ कंदन देखोनि आत्यंतिक । आक्रंदें दिधली हांक । परशुरामा पाव आवश्यक । माझें निजदुःख निवारावया ॥५४॥ तो मातेचा महाध्वनी । कैलासी पडे तुझ्या कानीं । तू आलासी तत्क्षणीं । मातृवचनीं अति भक्तीं ॥५५॥ हे पूर्वकथा इतिहासीं । जाली होती जैसी तैसी । ते सांगितली परशुरामासी । आश्रमवासी ब्राह्मणीं ॥५६॥

रेणुकेकडे परशुरामांचे आगमन : ऐसी ऐकोनि वार्ता । सवेग पाहूं आला माता । तिसी घायवट[९] देखतां । आक्रंदतां गहिंवरला ॥५७॥ रेणुका म्हणे पुत्रासी । तूं का येथें रडों आलासी । पुरुषार्थ[१०] नाहीं तुजपासीं । कैवारी होसी तूं काय ॥५८॥ ऐकोनि मातेच्या वचना । परशुराम लागे चरणां । शीघ्र मज द्यावी अनुज्ञा । सहस्रार्जुना छेदीन ॥५९॥ क्षोभें आज्ञा दिधली दुर्धर । सहस्रार्जुनाचे सहस्र कर । छेदोनि निवटीं[११] त्याचें शिर । दानव समस्त निर्दाळीं[१२] ॥१६०॥ युद्धामाजी शस्त्रास्त्रीं । मज घायवट केले क्षत्रीं । तरी त्वां पृथ्वी करावी निक्षत्री । धुंडमारी करोनियां ॥६१॥ सहस्रार्जुनासहित राजसुत । शोधोनि मारावे समस्त । दैत्य मातले उन्मत्त । तरी समूळ घात करीं त्यांचा ॥६२॥

एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची परशुरामाला रेणुकेची आज्ञा : माझें शरीर ते धरित्री[१३] । एकवीस घाय केली क्षत्रीं । एकवीस वेळां निःक्षत्री । पृथ्वी करीं ममाज्ञा ॥६३॥ वंदोनि मातेचे चरण । घेवोनियां धनुष्यबाण । परशु धरोनियां दारुण । कोपायमान चालिला ॥६४॥

जमदग्नीची उत्तरक्रिया व रेणुकेचे सहगमन : मातेची आज्ञा निःसीम । मूळपीठ पवित्र परम । तेथें मी करीन सहगम । मग उत्तरकर्म तूं करीं ॥६५॥ ऐसें बोलताचि पाहीं । रेणुका प्रवेशे जमदग्निदेहीं । तिचें प्रेत उरलें नाहीं । ते देहींच विदेही जगदंबा ॥६६॥ परशुराम ललाट पिटी । माते मज दे कां हो भेटी । येरीं वो दिधली मूळपीठीं । सांगितली गोष्ट करावी ॥६७॥

---

शब्दार्थ – १. आवेश, २. मग, ३. मरताच, ४. बंधनरहित, स्वतंत्र, ५. या नावाचे लोक, ६. नाश, ७. तत्काल, ८. मूर्च्छित, ९. जखम, १०. पराक्रम, ११. तोड, १२. मारून टाका, १३. पृथ्वी.

**परशुरामाची सहस्रार्जुनावर स्वारी :** मग सिंहाद्रीसीं परशुरामू । करोनि दोघांचे उत्तरकर्मू । पुढें आरंभिला युद्धधर्मू । परम संग्रामु रायासी ॥६८॥ जेथें वसे सहस्रार्जुन भूपती । तेथें ठाकोनि आला महिकावती । धनुष्यबाण घेवोनि हातीं । नगराप्रती पैं आला ॥६९॥ म्हणे विभांडूं राजनगरी । तैं प्रजा पीडिती समग्री । राजा निघालिया बाहेरी । सहपरवारीं मारीन ॥१७०॥ बाहेर येवोनि करावें रण । सांगून धाडूं धर्मवचन । नगरीं भिडतां आपण । होईल कंदन प्रजेसी ॥७१॥ ऐसें ऐकोनि जाण । राजा न येईल मजभेणें[1] । तैं नगरीं प्रवेशों आपण । राजभवन लक्षोनी ॥७२॥ प्रजेसी देऊनियां अभयदान । स्वस्थ राखून गोब्राह्मण । राजभवनीं प्रवेशोन । सहस्रार्जुन वधीन ॥७३॥ युद्धास यावें मजप्रती । सांगून धाडूं कोणाहातीं । ऐसें विचारतां चित्तीं । पुष्पहस्ती[2] भेटला ॥७४॥ रायाचे देवपूजेचा माळी । पुष्पें घेवोनियां करतळीं । ब्राह्मणाची अभिनव शैली । देखोनि जवळीं पाहूं आला ॥७५॥ परशुराम पुसे त्यासी । फुलें नेतोसी कोणासी । तो म्हणे मी रायाचा विश्वासी । देवपूजेपासीं पुष्पधारी ॥७६॥

**राजास युद्धार्थ आव्हान :** राम सांगे पुष्पधाऱ्यासी । जावोनि सांग रायापासीं । मजसीं यावें युद्धासी । सकल सैन्येसीं सन्नद्ध ॥७७॥ ऐकोनि रामवचनासी । माळी त्यातें उपहासी । मरणा धरणें कां बैसलासी । युद्ध रायासीं वांछिसी ॥७८॥ अंगीं दिसे ब्राह्मणपण । तुज कां आले धनुष्यबाण । परशु धरावया कार्य कारण । त्वां वेदपठण करावें ॥७९॥ राजा सैन्येंसीं सन्नद्ध सबळ । तूं एकाकी ब्राह्मणबाळ । तूं त्यासीं युद्ध प्रबळ । रणकल्लोळ घडे केवीं ॥१८०॥ जे जे मार्गस्थ देखती । ते ते म्हणती द्विज अपघाती[3] । रायासी युद्धप्राप्ती । हा मरणार्थी आतुर ॥८१॥ क्षत्रियासी युद्धाचें बळ । ब्राह्मण शापबळें सबळ । तें तू वांछिसी युद्ध प्रबळ । पूर्ण केवळ अविवेकी ॥८२॥ फुलारी म्हणे मज सांगतां । राजा करील तुझ्या घाता । ब्राह्मणहत्या बैसेल माझे माथां । मी सर्वथा सांगें ना ॥८३॥ मग परशुराम म्हणे मनीं । साधुत्वें येथें कोणी न मानी । पुरुषार्थ देखोनि जनीं । वचन मानी भलताचि ॥८४॥ ऐसें परशुराम अवधारी । मग धुमसिला[4] फुलारी । फुलें हिरोनि घेतलीं करीं । जायें शंख करीत राजसभेसी ॥८५॥

**आव्हान ऐकून घबराट :** आघातें पीडिला फुलारी । तो शंख करी राजद्वारीं । ऐकोनि धाकती नरनारी । राजा भीतरीं जीत कीं मेला ॥८६॥ सहस्रार्जुनाच्या राज्याभीतरीं । बोंब नाईकों स्वप्नांतरीं । ते बोंब पडली राजद्वारीं । राजा भीतरीं निमाला[5] ॥८७॥ ऐसी विश्वतोमुखी[6] वार्ता । भविष्य वदे वाग्देवता । ती बोंब रायें ऐकतां । चळकांप चित्ता सुटला ॥८८॥ म्यां गाईस केला शस्त्रपात । आणि ब्राह्मणा केला घात । पाप आचरलों बहुत । जय निश्चित मज नये ॥८९॥ फुलारियासी पुसे प्रधान । तुझे बोंबेसि काय कारण । तो म्हणे एक आलासे ब्राह्मण । धनुष्यबाणपरशूंसीं ॥१९०॥ तो रायासीं समदळीं । युद्ध करूं पाहे बळी । तो म्हणे सांग रायाजवळी । त्याची वचनावळी छेदिली[7] म्यां ॥९१॥ रासायीं ब्राह्मणासीं युद्ध । बोलणें तुझें अति अबद्ध । तेणें त्या ब्राह्मणासी आला क्रोध । मज सुबद्ध धुमसिलें ॥९२॥ फुलें हिरोनियां करीं । मज प्रहारिलें मुखावरी । तेणें मज आलें जिवावरी । यालागीं मी करीं महाशब्द ॥९३॥

**राजाच्या सैन्याची दुर्दशा :** प्रधानें बोलाविला सेनानी । ब्राह्मण आणावा धरोनी । तेणें ठाणांतरीं[8] पाचारोनी । म्हणे ब्राह्मण बांधोनि आणावा ॥९४॥ नगर नागरिक लोक । तेथें आले स्वाभाविक । हे बहुत तो एकला एक । युद्धकौतुक पाहूं पां ॥९५॥ बाहेर निघाला ठाणांतरी । पुढें पायिकाच्या[9] हारीं । एक गर्जती हाहाकारीं । एक शस्त्रें करीं झेलिती ॥९६॥

---

शब्दार्थ - १. मला भिऊन, २. फुले हातात घेऊन जाणारा-माळी, ३. आत्मघातकी, ४. बडवला, ५. ठार झाला, ६. सर्वतोमुखी, ७. शुद्र लेखणे, वाणीनेच कोटश्च कीटायते असे करणे, ८. राखणदार, ९. पायदळाच्या.

परशुराम म्हणे हे दीन । मारिलिया पुरुषार्थ कोण । यांचा रायासी अपशकुन । होय तैसें चिन्ह करूं यांसीं ॥९७॥ ऐसें म्हणोनि सोडिला बाण । अवघियांची शस्त्रें छेदून । सवेचि नाक कान सरकटून । बाण परतोन भातां रिघे ॥९८॥ कोणाचा व्याही जांवाई । कोणाचा भेटूं आला भाई । कौतुक पाहतां तेही । नाकानांस पाहीं मुकले ॥९९॥ कोणाचा पाहुणा मेहुणा । जांवाई आणिला दिवाळसणा । ते ते मुकले नाका काना । दाविता वदना सलज्ज ॥२००॥ शंख करिती आक्रंदोनी । नाक कान गेले दोनी । फेंफें करितां निघे ध्वनी । हे विटंबणी युद्धाची ॥१॥ सन्मुख घाई गेलिया प्राण । तें वीरांसी उत्तम मरण । परि जितां गेलिया नाक कान । तें चौगुण मरण निंद्यत्वें ॥२॥ वीर विटंबिले अनेक । नगरामाजी पडली हांक । कोपले राजपुत्र विटंक[१] । सन्नद्ध कटक[२] तिहीं केलें ॥३॥ साठ[३] प्रयुतें[३] कुंजर[४]। कोट्यानुकोटी रहंवर[५] । अमित चालिले असिवार[६] । पायाचे मोगर[७] गर्जती ॥४॥ सेनामुखीं सेनानी । राजपुत्र मध्यमानी । दक्षिणें राजे मुकुटमणी । चंड प्रचंड दोनी वामभागीं ॥५॥ वेगीं निघे सहस्रार्जुन । कुमर आणि प्रधान । तिहीं राहविला प्रार्थुन । ब्राह्मण बांधोन आणूं आम्ही ॥६॥ आम्ही असतां इतुके जण । एकला एक ब्राह्मण । तयावरी निघावें आपण । हें समरांगण नव्हे राया ॥७॥

युद्धार्थ राजा निघाला त्या वेळी त्याला अपशकुन होतात : यापरी मंत्रीं आणि कुमरीं । राजा राहवोनियां नगरीं । आपण येवोनियां दळभारीं । नगराबाहेरी निघाले ॥८॥ पुढें भेटले निर्नासिक । तो अपशकुन आत्यंतिक । मुख्य रायासीच घातक । हा आवश्यक शस्त्रार्थ ॥९॥ जळो तुमचें निंद्य मुख । मुहुर्तीं कां आलेति सन्मुख । अवघे निर्भर्त्सित लोक । तें अति दुःख घायाळां ॥२१०॥ घायाळ बोलती आपण । ब्राह्मण कोणाचा न घे प्राण । तुम्ही वांचवाल नाक कान । तें दादुलेपण[८] जाणवेल ॥११॥ प्रधान बोलिला आपण । परतों नये अपशकुनाभेणें[९]। परतणें हाचि अपशकुन । अति निंद्य जगामाजी ॥१२॥ युद्ध करितां परस्परीं । एका जय एका हारी । हें न चुके भलत्यापरी । शकुनाची थोरी मूर्खांप्रती ॥१३॥ अंगीं नाहीं आंगवण । त्यासी काय जय देईल शकुन । हें मानिती ते मूर्ख पूर्ण । शूरांचे लक्षण ऐसें नव्हे ॥१४॥ देव असे शकुनाचे ठायीं । तो काय अपशकुनीं नाहीं । शकुन अपशकुनाचें कांहीं । निधडे पाहीं न मानिती ॥१५॥ ऐसें बोलोनि प्रधान । त्राहाटिलीं भेरी निशाण । सैन्य चालविलें संपूर्ण । पुढें ब्राह्मण लक्षूनी ॥१६॥ एकाजनार्दना शरण । दानवांचे युद्ध दारुण । राम करील निर्दळण । तें रणकंदन अवधारा ॥२१७॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां परशुरामयुद्धप्रभावो नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥ ओंव्या ॥२१७॥ श्लोक ॥१॥

# अध्याय सतरावा

## सहस्रार्जुनाचा वध व शिवधनुष्याची पूर्वकथा

राजा व राजपुत्र यांच्याशी युद्ध व त्यांचा निःपात : श्रीसद्‌गुरूरामचंद्राय नमः ॥ परशुराम पाहे दुरून । निर्नायकी दिसे सैन्य । राजा नाहीं आला आपण । राजपुत्र पूर्ण देखिले ॥१॥ रायाचे राजसुत । शोधोनि मारावे समस्त । हे मातेची आज्ञा समर्थ । तो मी कार्यार्थ साधीन ॥२॥ केला त्र्यंबकाचा टणत्कार । नादें मूर्च्छित झाले सुर । दुमदुमले गिरिकंदर । राजकुमर धाकिन्नले ॥३॥ धाकें दचकला प्रधान । उभा ठेला धैर्य धरून । सैन्यें उभ्या उभ्या सांडिती प्राण । टणत्कारें पूर्ण नभ कोंदलें ॥४॥ बाण सोडिला सिंहमुख । तेणें गज मारिलें निःशेष । रथांचे छेदोनि आंख । वाजींचीं[१०] मस्तकें फोडिलीं ॥५॥ बाणपिसारा सुटला वारा । कोटी कोटी

---

**शब्दार्थ –** १. अत्यंत, २. सैन्य, ३. सहा कोटी, ४. हत्ती, ५. रथ, ६. स्वार, ७. पायदळ, ८. स्वपराक्रम, ९. स्वतःची शक्ती , ताकद, १०. घोड्यांची.

रहंवरां । उडवोनि नेलें अंबरा । वरिल्या वीरां आवर्तु[1] ॥६॥ वरील वीर तळीं पडत । तळीं धुरा चूर होत । रथ अंगभारें आदळत । तेणें पीठ होत शूरांचें ॥७॥ बाण सोडिले संपूर्ण । आवर्तीं पडिलें सैन्य । जो जिकडे सरे चुकवोन । तिकडेचि बाण खडतरती ॥८॥ धाकें धाकें घायाभेणें । आडवी वोडवती[2] वोडणें[3] । वोडणें फोडोनियां बाणें । सर्वांग संपूर्ण भेदिलें ॥९॥ रामें मांडिली रणकळी । शिरांची केली चेंडुफळी । राजे मारिले अतुर्बळी[4] । रुधिरांजुळी[5] प्राशिती भूतें ॥१०॥ सैन्या देखोनि महामार । खळबळिले राजकुमर । प्रधान धांविन्नले समोर । अति दुर्धर निजयोत्रें ॥११॥ बाणांचिया झडाडा । प्रधान उडविला रोकडा । नेऊन टाकिला रायापुढां । मस्तकीं तडा पडोनि मेला ॥१२॥ चंड आणि प्रचंड । तिहीं युद्ध केलें वितंड । त्यांचें छेदोनियां बाहुदंड । दोहींचें मुंड पाडिलें ॥१३॥ दोघे पाडिले अति दुर्धर । रणीं उठला हाहाकार । हाक[6] दैत्यांचें[6] छेदी वक्त्र । वीरें वीर आटिले ॥१४॥ मग लक्षिले राजकुमर । तेही चालिले अति दुर्धर । युद्ध चाले घोरांदर । शस्त्रास्त्रलाघवें ॥१५॥ बाणें बाणांतें तोडित । शस्त्रें शस्त्रांतें झोडित । अस्त्रें अस्त्रांतें मोडित । मग ओढित निर्वाणशस्त्रें ॥१६॥ रामें छेदिले त्यांचे रथ । सारथी मारिले शतानुशत । वीर मारोनियां तेथ । अवघे विरथ रणीं केले ॥१७॥ अंतकांतक[7] अर्धचंद्रें[8] । निःशेष छेदिलीं त्यांची शस्त्रें । सचेंचि निवटिलीं शिरें । अवनीं रुधिर प्रवाहे ॥१८॥ राजपुत्र पडतां क्षितीं । पडल्या वीरांच्या पांथी[9] । रामें रणीं लाविली ख्याती । केली शांति सर्वांची ॥१९॥ रणांगणा जे जे आले । ते ते निःशेष निर्दाळिले । बांब सांगावया नाहीं उरले । रामें केले निक्षत्री ॥२०॥ अश्व गज रथ पदपदाती अतिरथी महारथी । जे जे आले युद्धाप्रती । त्यांची समूळ शांति[10] भार्गवें केली ॥२१॥

राजाची उद्विग्नता : प्रधान पाडिला राजभवनीं । पुत्र पडिले रणांगणीं । राजा क्षोभला ऐकोनी । युद्धालागोनि उठवला ॥२२॥ सैन्य निमालें समस्त । उरले पार्षद[11] पाच शत । राजा एकाकी युद्धार्थ । बैसला त्वरित रथावरी ॥२३॥ राजा मनीं करी विचार । म्यां गाई ब्राह्मणां लाविलें शस्त्र । तेणें मी जाहलों अपयशःपात्र । आतां करावें क्षात्र[12] क्षात्रधर्में ॥२४॥ दावीन क्षात्रधर्म रणीं । परशुराम त्रासीन बाणीं । कटाक्षें भिडेन रणांगणी । निजनिर्वाणीं युद्धार्थी ॥२५॥ तो सूड मागेल पित्याचा । मी सूड घेईन पुत्रांचा । पाहों पराक्रम दोहींचा । गर्जोनि वाचा उठावला ॥२६॥

परशुरामाकडून राजाचा धिःकार : परशुराम सतेज बोले । जेवोनियां घर घेतलें । तें तुवांचि दुष्टा साच केलें । निर्वैरा मारिलें जमदग्नी ॥२७॥ जमदग्नीनें सांडिला कोप । त्यावरी त्वां केला प्रताप । वृथा करिसी बळाचा जल्प[13] । तूं अति अल्प लघुत्वें ॥२८॥ स्त्रियावरी तुजा पुरुषार्थ । माझी माता पडली मूर्च्छित । तो तूं सांपडलासी येथ । तुझा निःपात मी करीन ॥२९॥

दोघांचे युद्ध : ऐसा ऐकतां वचनपुंज । कोपें चालिला सहस्रभुज । त्यावरी लोटला द्विभुज । धरावया गज केसरी जैसा ॥३०॥ जमदग्नीचा अति क्रोध । होता परशुरामीं प्रसिद्ध । तो खवळला अति विरुद्ध । रायाचा कंडू छेदावया ॥३१॥ कोपें धनुष्या वाहिला गुण । काढिले अति तीक्ष्ण बाण । सरसावला सहस्रार्जुन । युद्ध दारुण मांडिलें ॥३२॥ दोहींचे बाण तिखट । बळें पिच्छांचा झुंझाट । गगनीं बाणांचा खणखणाट । हव्यवाट[14] उठिला ॥३३॥ बाणें बाणातें निवारी । शस्त्रें शस्त्रातें संहारी । अस्त्र अस्त्रातें स्वयें वारी । शस्त्रास्त्रीं प्रवीण ॥३४॥ सहस्र भुजांचा धनुर्वाडा[15] । द्विभुजें लावियेला वेढा । बाणांचिया

---

शब्दार्थ - १. चक्र, २. समोर धरिती, ३. ढाला, ४. शक्ति मानू, ५. रक्ताच्या ओंजळी, ६. आरडा ओरडा करणाऱ्यांचे, ७. काळालाही मारील असा, ८. अर्धचंद्राकार बाणाने, ९. पंक्ती, १०. मारले, ११. नोकर, चाकर, १२. क्षात्रधर्म, १३. वाचाळपणा, १४. अग्नी, १५. धनुर्धर.

झडाडां । कांहीं कैवाडा[1] स्मरेना ॥३५॥ त्याचि लाघवामाजि देख । रामें रथाचा छेदिला आंख । सारथि मारिला नि:शेष । वारू अमोलिक पाडिले रणीं ॥३६॥ मागूनियां रथांची भरणी । तेही वीर छेदिले रामें बाणीं । साहाय्यकारी नाहीं कोणी । एकला रणीं उरे राव ॥३७॥

अस्त्रांनी द्वंद्वयुद्ध : विरथी राजा उरे आपण । क्रोधें मांडिलें निर्वाण[2]। अस्त्रें अनिवार योजून । त्यांचें निवारण नेणती कोणी ॥३८॥ दंडास्त्र आणि चंडास्त्र । सर्वेचि सोडिलें प्रचंडास्त्र । वेगें मोकली वितंडास्त्र । घोर घोरास्त्र अनिवार ॥३९॥ देखोनि शस्त्रांचा संभार । रामनेटका धनुर्धर । शस्त्रें शस्त्रांचा संहार । करी तो प्रकार अवधारा ॥४०॥ दंडें दंडिले दंडास्त्रा । खंडे खंडिले खंडास्त्रा । चंडें छेदिलें प्रचंडास्त्रा । छेदिलें घोरास्त्र अघोरास्त्रें ॥४१॥ निर्वाणास्त्रें समस्त । रामे केली वाताहत । मग अनिवार अति अत्यंत । तें चामुंडास्त्र घेतलें रायें ॥४२॥ पूर्वी मर्दिलें चंडमुंडासी । तें चामुंडास्त्र हातवसी[3] । राम आव्हानी काळिकेसी । चामुंडा दासी तियेची ॥४३॥

चामुंडेचे माघारी येणे : चामुंडेसी म्हणे काळिका । माझें स्वरूप तें रेणुका । तिच्या पतीच्या घातका । तूं आवश्यक निर्दाळीं ॥४४॥ चांमुडा काळिकेची दासी । हें सत्य न मानेल ज्यासी । तिहीं पहावें सप्तशतीसी । चंडमुंडांसी जेथें वधिलें ॥४५॥ काळिकेसी करोनियां नमन । घेवोनि तिचें आज्ञापन । चामुंडा परतली आपण । करावया निर्दळण रायाचें ॥४६॥ चामुंडा वळली उफराटी । सहस्रार्जुन देखे दृष्टीं । माझीं अस्त्रें लागती मजचिपाठीं । धाकें पोटीं गजबजिला ॥४७॥ चांमुडेचें निवारण । माझें मी नेणें आपण । अवश्य मज आलें मरण । धाकें संपूर्ण कांपत ॥४८॥ रामें त्याचि क्षणामाझारीं । परशु घेवोनिया करीं । सहस्र बाहूंची कांडोरी । धरणीवरी पाडिलीं ॥४९॥

सहस्रर्जुनाचा वध, परशुरामस्तवन : साधोनि निर्वाणीचा आवो[4]। मग मस्तकीं घालता घावो । तेणें घायें महाबाहो । पडिला पहा हो क्षितितळीं ॥५०॥ शिर उडालें अंतराळीं । जीवें परशुरामासी ओंवाळी । मग उतरलें पायांजवळीं । चरणांची धूळी वंदावया ॥५१॥ सद्भावें आदरिली स्तुती[5] । मी गोब्राह्मणपरमघाती । त्या मज शस्त्रधारातीर्थीं । पापनिष्कृती[6] निजकरें केली ॥५२॥ छेदिला सहस्र भुजांचा भार । छेदिला माझा अहंकार । छेदिला वासना-संभार[7] । जीवोद्धार तुवां केला ॥५३॥ छेदिलें माझे कर्माकर्म । छेदिले माझे धर्माधर्म । छेदोनि माझा मोहभ्रम । ब्रह्म परम मज केलें ॥५४॥ छेदिलें माझे नांवरूप । छेदिलें माझें पुण्यपाप । छेदूनिया संकल्पविकल्प । ब्रह्म निर्विकल्प मज केलें ॥५५॥ छेदिलें अहंसोहंपण नि:शेष छेदिले मीपण । छेदोनि एकत्वाचें एकपण । ब्रह्म परिपूर्ण मज केलें ॥५६॥ ऐसें करिती स्तवन । प्रेमें पूर्ण जालें नयन । मस्तकीं वंदूनि चरण । सांडिला प्राण सहस्रार्जुनें ॥५७॥ मातेचि आज्ञा अति सधर । पहिले छेदावे सहस्र कर । मग छेदावें त्याचें शिर । तोचि प्रकार रामें केला ॥५८॥ सहस्रार्जुन पडिला रणक्षेत्रीं । सर्वेचि तीन सप्तकें धरित्री । परशुरामें केली नि:क्षत्री । आज्ञेवरी मातेच्या ॥५९॥ एकाजनार्दना शरण । जालें रेणुकापुराण । आतां जानकीचें लग्न । सावधान अवधारा ॥६०॥ सांगतां धनुष्यप्रकरण । प्रसंगें आलें रेणूका-आख्यान । कथेसी जालें विलक्षण । श्रोतीं संपूर्ण क्षमा कीजे ॥६१॥

परशुरामाचे मिथिलेला आगमन : रामें नि:क्षत्री पृथ्वी करिता । मिथुळेसी आला अवचितां । ऋषिवृंदासी होय पुसता । येथें राज्यकर्ता कोण होय ॥६२॥ ऋषि सांगती परशुरामा । हा

---

शब्दार्थ - १. संकटातून सुटण्याचा उपाय, २. घनघोर संग्राम, ३. हातात घेतले, ४. अवसान, ५. आरंभ केला, ६. पापाचे निरसन, पापक्षालन, ७. वासनेचा समुदाय.

चक्रवर्ती[१] धर्मात्मा । देही असोनि विदेहीधर्मा[२] । अगाध महिमा पैं याचा ॥६३॥

जनकाकडून सत्कार : ऐसें ब्राह्मण बोलिले उत्तर । तंव जनक सामोरा आला सत्वर । आलिंगोनी परमादर । रामासहित ऋषीश्वर गृहा नेले ॥६४॥ जनक राजा ब्रह्माधिकारी । परशुराम त्यातें न मारी । एकात्मता प्रीताकरीं । त्याचे घरीं राहिला ॥६५॥ जनकें परशुरामासी । राहविलें भोजनासी । रामासवें अपार ऋषी । जनकें त्यांसी निमंत्रिलें ॥६६॥ रामें ठेवोनि धनुष्यबाण । स्वयें केलें संध्यास्नान । भीतरीं करावया भोजन । ऋषिपंक्ति पूर्ण बैसली ॥६७॥

भोजनाचे वर्णन : तारें वाढिलीं चोखंडी[३] । अवघ्या रसां एकचि गोडी । जनकें अत्यंत आवडीं । केली परवडी[४] भृगुवर्या[५] ॥६८॥ ते देखतांचि परिपक्वान्न । देखणें देखती निजनयन । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । समरसें लोचन सुखी जालें ॥६९॥ स्वानंदी भोजना देतां मिठी । शब्दीं निःशब्दता श्रवणीं उठी । तेणें भवणाचिये पोटीं । सुखसंतुष्टी स्वानंदें ॥७०॥ यापरी पक्वान्नाचा वास । सबाह्य समरसीं परेश । तो येतांचि सुवास । सुखउल्लास घ्राणासी[६] ॥७१॥ तें सदन्न स्पर्शतां । हाता आली अकर्मात्मता । क्षुधा तृषा नित्यतृप्तता । क्रिया चित्सत्ता स्वयें जाली ॥७२॥ तो सेवितांचि रसास्वाद । रसनेमाजि[७] निजानंद । उदरीं कोंदला परमानंद । सबाह्य स्वानंद रसास्वादीं[८] ॥७३॥ ऐसें करितां भोजन । मनें मनचि उन्मन । समाधीसी समाधान । अन्नचि चैतन्य स्वयें जालें ॥७४॥ सकळ साधनेंसी वरी लवण । तंव तृप्ति जाली संपूर्ण । श्रीरामाचे पंक्तीस जें भोजन । अपूर्णपण असेना ॥७५॥ यापरी स्वयें तृप्त जाले । स्वयेंचि संसारा आंचवले[९] । तृप्तिसुखें सुखी जालें । स्वस्थ राहिले स्वस्थानीं ॥७६॥

तांबूलवर्णन : फळाशा फोडोनियां फोडी । वासनाशिरा काढोनि बुडीं । शांतिपरिपक्का पानाची विडी । स्वलीला तोंडीं घातली ॥७७॥ जाळूनि अहंकार कठिणपणा । सोहं गाळींव शुद्ध चुना । लागोनि शांतिपरिपक्क पाना । तांबूलस्वादना सुस्वादु ॥७८॥ सर्व साराचें निजसार । तेंचि सेविती खदिरसार[१०] । श्रीरंगरंगाकार । अति पवित्र तांबूल ॥७९॥ अर्पिलें सुमन चंदन । दीपावली नीरांजन । यथोक्त करितां पूजन । सुखसंपन्न भार्गव ॥८०॥

सीता शिवधनुष्याचा घोडा घोडा करून खेळते : परशुरामाचा निजमेढा[११] । सीतेनें स्वयें करोनि घोडा । सीताचा[१२] करोनि वोढा । बाणाचा गाढा जाणा केला ॥८१॥ त्या धनुष्यावरी बैसोनी । घोडा नाचवि राजांगणीं । स्वेच्छा क्रीडे राजभवनीं । राजबिंदीतूनि[१३] धांवडी ॥८२॥ ठेविले ठायीं धनुष्यबाण । राम न देखे आपण । मग रायावरी कोपायमान । काय वचन बोलिला ॥८३॥ माझ्या धनुष्याची चोरी करी । ऐसा बळिया कोण क्षत्री । तुवां लपविला आहे घरीं । तो झडकरीं मज दावीं ॥८४॥ पांच शत महावीरीं । धनुष्य नुचले तिळभरी । त्याची जेणें केली चोरी । तो झडकरी मज दावीं ॥८५॥ ऐकोनि क्रूर रामवचन[१४] । राजा जनक कंपायमान । आजि मज आलें पूर्ण विघ्न । राम क्षत्रघ्न[१५] कोपला ॥८६॥ राजा त्या धनुष्याचा लाग । स्वयें गिवसू[१६] लागला[१६] चांग । राजांगणीं देखोनि रेघ । तोचि माग घेत आला ॥८७॥ तंव धनुष्याचा करोनि घोडा । सीता खेळतां देखे पुढां । राजबिंदीं घेतला दवडा[१७] । बाळक्रीडा क्रीडत ॥८८॥ राजा म्हणे अगे कुवारी[१८] । हा त्वां अन्याय केला भारी । तें धनुष्य सांडी क्षितीवर । तें रायां करी उचलेना ॥८९॥ मग राजा अति प्रीतीकरीं । सीतेतें पोटासीं धरी । म्हणे बैस या घोड्यावरी । ते हरिखें वरी बैसली ॥९०॥

---

शब्दार्थ – १. सार्वभौम, सम्राट, २. विदेही स्थितीने वर्णन करणारा, ३. निर्मळ, ४. उपचार, ५. परशुरामाला, ६. नाकाला, ७. जिव्हेमध्ये, ८. रसाच्या चाखण्याने, ९. विरक्त झाले, १०. कात, ११. स्वतःचे धनुष्य, १२. धनुष्याच्या दोरीचा, १३. राजमार्गातून, १४. परशुरामाचे बोलणे, १५. क्षत्रियांना मारणारा, १६. शोधू लागला, १७. लांब, १८. कुमारी.

सीतेचा विक्रम पाहून परशुरामास परमाश्चर्य : करोनि धनुष्याचा घोडा । नाचवीत तडातडां । आली परशुरामापुढां । देखोनि गाढा तो विस्मित ॥९१॥ तो म्हणे ही आदिशक्ती । आणिकां धनुष्य नुचले हातीं । इसी आदिपुरुष होईल पती । आणिकासी प्राप्ति नव्हे इची ॥९२॥ राम रायासी पुसे विचार । इसी कोण नेमिला वर । तो म्हणे नाहीं केला निर्धार । इचें स्वयंवर करणें आहे ॥९३॥ परशुराम म्हणे रायासी । स्वयंवर करणें सीतेसीं । मी सांगेन त्या प्रकारासी । जो सर्वांसी दुर्घट ॥९४॥ हे आदिईश्वरीचा[1] अवतार । आदिपुरुष इसी वर । मी सांगेन जो पणप्रकार । तो सादर अवधारीं ॥९५॥ स्वयंवरीं हाचि पण । जो या धनुष्यासी वाहील[2] गुण[2] । त्यासीच द्यावी हे आपण । आज्ञा संपूर्ण भार्गवाची ॥९६॥ तेणें सीतेच्या स्वयंवरासी । धनुष्य ठेविलें जनकापासीं । जेणें धनुष्यें त्रिपुरासी[3] । एकें बाणेंसीं छेदिलें ॥९७॥ शिवें येणेंचि धनुष्येंसी । विध्वंसिलें दक्षयागासी । पळवूनी सुरनरऋषी । यज्ञभंगासी पैं केलें ॥९८॥ हेंचि शिवचाप घेवोनि करीं । एकवीस वेळा निःक्षत्री । परशुरामें केली धरित्री[4] । तें हे स्वयंवरीं ठेविलें चाप ॥९९॥ हे धनुष्याची मूळवार्ता । अतिशयेंसीं रसाळ कथा । शतानंद जाला सांगतां । ऐकोनि समस्तां आश्चर्य ॥१००॥ आतां जनकाच्या निजघरीं । स्वयंवरसभेची परी । जे महासभेमाझारी । रामप्रतापथोरी धनुर्भंगें ॥१॥ त्या स्वयंवराचें निरूपण । रसाळ कथेचें गोडपण । एकाजनार्दना शरण । श्रोते सज्ञान अवधान देत ॥२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां चापनिरूपणं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥ ओंव्या ॥१०२॥

## अध्याय अठरावा

### शिवधनुष्याचा प्रताप व सीतास्वयंवरात रावणाची फजिती

स्वयंवरास आलेले निमंत्रित राजे-महाराजे : श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः । स्वयंवरसभेची स्थिती । स्वर्गीं देव विमानीं पहाती । शहाण्णव कुळींचे भूपती । दाटले[5] क्षितीं सन्मानें ॥१॥ आले तपस्वी ऋषीश्वर । आले यक्ष गंधर्व किन्नर । स्वयंवरा आले निशाचर[6] । दैत्य महावीर तेही आले ॥२॥ धैर्य वीर्य महाशौर्य । रूपगुणी गुणगांभीर्य । धर्माधर्म अति औदार्य । ऐसे नृपवर्य येते झाले ॥३॥ जे ग्रोब्राह्मणां साह्यार्थीं । ज्यांची यशकीर्ती महाख्याती । ज्यांचे पवाडे[7] स्वर्गीं गाती । स्वयंवरार्थीं येते जाले ॥४॥ जे दान देती सर्वस्व । ज्यांची वैकुंठीं वर्णिती वाढिव[8] । ज्यांचें त्रैलोक्यीं प्रसिद्ध गौरव[9] । तेही राजे येते जाले ॥५॥ ज्यांच्या शस्त्रांचा महामार । साहों न शकती सुरासुर । जे दानीं नित्य तत्पर । ते नृपवर येते जाले ॥६॥ दानें दळें बळें प्रबळ । शहाण्णव कुळींचे भूपाळ । येते जाले सकळ । सीतार्थी[10] केवळ स्वयंवरा ॥७॥ स्वयंवरी धनुष्याचा पण । तें जनके आणावें आपण । ज्यासी असेल आंगवण । तो त्यासीं गुण लावील ॥८॥

सभेत शिवधनुष्य आणण्याची प्रधानास आज्ञा : ऐसें ऐकोनि रायाचें वचन । जनकें बोलाविला प्रधान । धनुष्य आणावें आपण । आज्ञापन स्वयें केलें ॥९॥ तंव बोलिले महाऋषी । आधीं आणावें नोवरीसीं । मग आणावें धनुष्यासी । वचन सर्वांसी मानलें ॥१०॥ सीता नाकळे कर्मबंधासी । नाहीं जन्मली गर्भवासी । स्रष्टा[11] स्रजूं[12] न शके जीसी । रामप्रभावेंसी समप्रभाव ॥११॥ श्रीराम चैतन्याची कळा । चिच्छक्ति ते जनकबाळा तिच्या स्वरूपाचा सोहळा । सभाग्य डोळां देखती ॥१२॥

---

शब्दार्थ - १. आदिशक्तीचा, २. दोरी चढवील, ३. त्रिपुर या नावाच्या असुराला, ४ पृथ्वी, ५. आले, जमले, ६. राक्षस, ७. पराक्रम, ८. सामर्थ्य बळ, ९. मोठेपणा, १०. सीतेकरिता, ११. ब्रह्मदेव, १२. निर्माण करण्यास.

सीतेचे आगमन, तिचे महिमान, चंद्राशी तुलना : सालंकृत गजावरी । सीता बैसली नोवरी । तिच्या सौंदर्याची थोरी । चराचरीं अनुपम्य ॥१३॥ शून्यत्वें वाळिलें[1] आकाश । तें शरण आलें सीतेस । राम वंदावया सावकाश । मस्तकीं केश तें जालें ॥१४॥ शून्यत्व सांडोनि तत्काळ । जालें मस्तकीं केश कुरळ । तेंचि आकाश सुनीळ । जेथें चंद्रमंडळ मुखचंद्र ॥१५॥ चंद्र पूर्णिमेसीच पूर्ण । मुखचंद्र सदा संपूर्ण । चंद्रा राहूचें पर्वीं ग्रहण । येथें नित्य ग्रहण श्रीरामें ॥१६॥ चंद्रबिंबास कळंक । मुखचंद्र नित्य निष्कळंक । देखतां सीतेचें श्रीमुख । होती निर्दुःख भावार्थी ॥१७॥ चंद्रीं नक्षत्रें पुढेंमागें । तैसी तानबडे मोतिलगें[2] । कुंकुम सुरंग रामरंगें । तोचि निजांगें मळवट ॥१८॥ श्रीराम देखलियावरी । घालूं विसरली ते भोंवरी । भंवऱ्या निमायेच्या करीं । राजे भ्रमचक्रीं पाडिले तिणें ॥१९॥ सीताभ्रमाचिया भवरीं । रावण पडला भ्रमचक्रीं । जानकीभ्रमें स्वयेंवरी । आपदा थोरी भोगील ॥२०॥ भंवरीभ्रमाचा निजनाश । करावया श्रीरामचि कळस । त्याचेनि नांवे भ्रमाचा नाश । होय सावकाश श्रीरामें ॥२१॥ रामनामें निरसे भ्रम । यालागीं भंवऱ्याचा संभ्रम । जानकीसी नाहीं परम । भंवरीचें नांव ते निघे ॥२२॥ जानकीचें निजनिढळ[3] । रामचरणें सदा सफळ । तिचेंचि धन्य कपाळ । वानिती सकळ ऋषिवर्य ॥२३॥ चंद्रबिंबीं काळिमेचा[4] काट । तैसा कस्तुरीचा मळवट । मुखचंद्रीं मिरवे चोखट । त्यावरी बोट कुंकुमाचें ॥२४॥ श्रीरामरंग अति सुरंग । तेणे रंगें रंगलें कुंकुम चांग । अवेहपण[5] अति अभंग । निढळींचें अंग शोभवी शोभा ॥२५॥ चंद्र सदा क्षयरोगी । तेणें व्हावया नित्य निरोगी । जडला जानकीच्या अंगीं । जाला सवेग अर्धचंद्र ॥२६॥ सेवावया श्रीरामअधरामृत । अर्धचंद्र होवोनि तेथ । चंद्रमा राहिलासें टपत । पाहे एकांत प्रकृतिपुरुषां ॥२७॥ तया अर्धचंद्रावरती । भांगी सेंदूराची आरक्ती । भावें भाळावया रघुपती । प्रेमाच्या प्रीतीं पूजिली माया ॥२८॥ माया विकल्पें दे अविद्या । भाविका हे शुद्ध सद्विद्या । जानकीची श्रीरामीं मेधा[6] । त्याच्या निजपदा विनटेल[7] ॥२९॥ भांगींची नव्हे सेंदूरस्थिती । तेणें ओघें आली सरस्वती । भावें भेटावया रघुपती । विरक्तीच्या प्रीतीं अनुरक्त ॥३०॥ तिच्या दोहीं तटीं हंसळिया । श्रीरामध्यानें बैसलिया । म्हणोनि मुक्ताफळीं शोभलिया[8] । बाह्या जालिया सीतेसी ॥३१॥ जेवीं नक्षत्रें नभोमंडळीं[9] । तेवीं मस्तकीं मोतियांची जाळी । श्रीरामानुसंधानें ओंविली । मस्तका आली मुक्तत्वें ॥३२॥ त्यावरी भक्तिफरा झळकत । नवविधरत्नविराजित । स्वर्गथां वांकुल्या दावित । भजा रघुनाथ अक्षयार्थ ॥३३॥ श्रीराम लक्षितां दृष्टीं । सुटली भवयांची गांठी । सहज सांडोनियां व्यंकटी[10] । अवलोकोनि उठी स्वरूपता ॥३४॥ जगाची जे डोळसता । सदा शिणली दृश्य देखतां । सीतेच्या डोळ्यां शरणागतां । आली रघुनाथा पहावया ॥३५॥ श्रीरामाचें पूर्णपण । देखता डोळे सुखसंपन्न । यालागीं जगाचें देखणेपण । सीतेसी शरण स्वयें आलें ॥३६॥ जगाची देखणी अवस्था । तीही डोळा डोळसता । श्रीरामाची सुखस्वरूपता । पहावया तत्वतां अति सादर ॥३७॥ यापरी सीतेचे नयन । देखणेपणें सुलोचन । त्यावरी सूदलें[11] अंजर । रामनिधान[12] साधावया ॥३८॥ साधूचें अवक्र आस्तिक्य । तैसें शोभे सरळ नासिक । नाके निवटोनि नास्तिक्य । प्राणासी सख्य श्रीरामें ॥३९॥ सदा सैराट[13] विचरे प्राण । तेणें वसविले जानकीचें घ्राण । होतां श्रीरामसन्निधान[14] । समाधान प्राणांसी ॥४०॥ सेवावया श्रीरामअधरामृत । सीतेचे अधर अति आरक्त । त्याचिया आर्ती अति आसक्त । लाजवीत प्रवाळा[15] ॥४१॥ उपमे प्रवाळें अति कठिण । अधर मृदु गगनाहून । तें सीतेचे अधरपान । रघुनंदन स्वयें जाणे ॥४२॥ सकळांच्या मुखींचे दांत । रसाविषयीं अति

---

शब्दार्थ – १. टाकिले, २. अलंकारविशेष, ३. कपाळ, ४. कलंकाचा, ५, सौभाग्य, ६. बुद्धी, ७. आसक्त होईल, ८. अलंकारविशेष, ९. आकाशात, १०. वक्रता, ११. घातले, १२. रामरूपी ठेवा, १३. स्वच्छंदपणाने, १४. श्रीरामाचा सहवास, १५. पोवळ्याला.

अदांत[१] । जानकी मुखींचे ते दांत[२] । यालागीं रघुनाथ भाळला[३] मुखा ॥४३॥ अधरतळींची[४] चिबुका[५] । रामरंगें गोंदिली देखा । श्यामतेज वर्ण नेटकां[६] । रघुकुळटिळका भाळवी ॥४४॥ मुक्त रिघोनि सुवर्णपाशीं । वनिताघरीं[७] आलें नाकासीं । जानकीनाकें मुक्तिसुखासी । श्रीरामासी देखिलिया ॥४५॥ लाजवोनि बारा सोळा । तेज मिरवे गंडस्थळा । देखतां ठक[८] पडे डोळां । लागली सकळां टकमक ॥४६॥ देखोनि जानकीमुखचंद्र । लाजिन्नला रजनिकर[९] । लाजा होवानिया अर्धशरीर । जाला अर्धचंद्र जानकीभाळीं ॥४७॥ चंद्रासी गति नित्य नक्षत्रें । मुखचंद्रा गति रामचंद्रें । चंद्र प्रतिपाळी चकोरें । येणें मुखचंद्रें जीव शिव ॥४८॥ चंद्रीं उदयास्त अहर्निशीं । मुखचंद्र उदयास्तातें ग्रासी । उद्यतप्रभा मुखचंद्रासी । जिवशिवांसी प्रकाश ॥४९॥ शुद्ध श्यामता श्रीरामा । तेचि सुनीळ नभोपमा । तेथें मिरवे मुखचंद्रमा । श्रीरामव्योमामाझारीं[१०] ॥५०॥ स्मरणाची गळसरी गोमटी । ऐक्यभावें पडिली गांठी । न तुटतां धरिली कंठीं । लोकदृष्टीं अलक्ष ॥५१॥ जे कंठीं रामनामठसा । तेथें चितांक रिघे कैसा । चितांकलेणें ते दुर्दशा । सीतेच्या मानसा शृंगार श्रीराम ॥५२॥ जीवशिवपद सांडोनि देख । श्रीरामपदींचा पदांक । तेंचि हृदयींचें पदक । केलें आवश्यक जानकीया ॥५३॥ हृदयपदकाचें महिमान । चिद्रत्नीं जडित पूर्ण । मुक्तमौक्तिकें ओंवून । गुणेंविण ल्यालीसें ॥५४॥ त्रिगुण आणिले निर्गुणेंसीं । तेचि बाहुवटे सीतेसी । रामकीर्तिमुखें जडोन त्यांसी । उभयबाहूंसी भूषण ॥५५॥ ओंकारामाजिल्या श्रुती । कर्मकांडीच्या उपपत्ती । वेदार्थकंकणें सीतेच्या हातीं । रुणझुणती स्वानंदें ॥५६॥ दशांगुळीं दशमुद्रिका । चढत्या वाढत्या जडल्या टीका । दशावताराच्या माणिका । जीवाच्या जीविका जडित केल्या ॥५७॥ पंचभूतें पंचांगुळिका । सीतेच्या मुष्टी होती एका । श्रीराम सीतेची धनरेखा । तिहीं लोकीं जगद्वंद्य ॥५८॥ गुणीं गोंविले मुक्तफळां । न पवती मुक्तीचा जिव्हाळा । येवोनि पडती जानकीच्या गळां । श्रीराम स्वलीला सेवावया ॥५९॥ सुमनें विमनें जालीं फळा । राम जीवींचा जिव्हाळा । सेवावया सूत्रीं बांधोनि गळा । सीताकंठी माळा सुमनें जाली ॥६०॥ सीता होती धरणीतळीं । त्या धरित्रीच्या स्नेहमेळीं । निजांगे सुनीळ कांचोळी । जनकबाळी लेईली ॥६१॥ भक्त सकामत्वें अति गांजली । निष्काम राम सेवावया वहिली[११] । सीतेचे अंगीं रिघाली । कांचोळी-जाहली नवखंड ॥६२॥ भक्ति सर्वदा नवखंड । नवखंडें ते अखंड । सीता सांडवूनि नवविध बंड । केली अखंड श्रीरामभजनें ॥६३॥ पृथ्वी नवखंडें नांदली । तेही जडजाड्यत्वा उबगली[१२] । भक्ति नवखंडें अखंडली । सीतेची जाली कांचोळी ॥६४॥ येणेंचि स्वार्थें धरित्रीं । सीता धरिली होती उदरीं । हे निघालिया बाहेरी । धरा उद्धरी श्रीरामसंगें ॥६५॥ भक्तिभावाचें बिरडें । कांचोळिये घातले फुडें[१३] । श्रीराम फेडील सांकडें । आणिका नवखंडी नुगवे हें ॥६६॥ आंगींचे अंगीं भिन्नअभिन्नीं । जीव शिव वाढले हृदयस्थानीं । तेणेंचि कुचभारे कामिनी । व्यंजनस्तनी शोभत ॥६७॥ विद्या अविद्या पाखें दोनी पाहीं । दोनी आच्छादी दोहीं ठायीं । एक देही एक विदेही । गुणागुणान्वयीं बांधल्या कसण्या[१४] ॥६८॥ त्रिगुणांचे गोंडे नागर । पाठीवरी रुळती सुंदर । श्रीराम व्हावया तत्पर । शोभती मनोहर जानकीसीं ॥६९॥ त्रिगुणांची ग्रंथी दारुण । छेदील श्रीराम आपण । आणिकाचें न चले जाणपण । ते गिळिती गुण गर्वाभिमानें ॥७०॥ भक्तिवैराग्यनित्यदीप्त । रामअनुरागें अनुरक्त । तेचि सेंदुरी साडी आरक्त । हर्षयुक्त नेसली ॥७१॥ शोधित सत्वाचा सात्विक । क्षीरसागरींचा क्षीरोदक । वैरणा शोभे अति चोख । तेजें आलोक[१५] लोपत ॥७२॥

---

**शब्दार्थ** – १. अतृप्त, २. तृप्त, ३. भुलला, ४. ओठाच्या खालची, ५. हनुवटी, ६. सुरेख, ७. स्त्रीच्या (जानकीच्या) ओष्ठभागी, ८. तटस्थपणा, ९. चंद्र, १०. रामरूपी आकाशात, ११. ताबडतोब, १२. कंटाळली, १३. सत्य, १४. बांधावयाच्या दोऱ्या, १५. प्रकाश.

परिधानेंसी समसूत्र । तेंचि जानकीचे कटिसूत्र । तेणेंचि महत्त्व अपार । शोभे सुंदर कटिसूत्रें ॥७३॥ किंकिणीजालमाळा । कटिसूत्रीं सिद्धी सकळा । क्षुद्रघंटिका ऋद्धि प्रबळा । कटिमेखळा शोभत ॥७४॥ पृष्ठभागीं रुळे वेणी । माजी अनर्घ्य श्याम मणी । मूद मिरवताहे चिद्रत्नीं । शोभे कामिनी सौभाग्यें ॥७५॥ तिच्या वैराग्यपल्लवासीं । मुक्तमोतियें झळकती कैसीं । तें देखून भाळलें संन्यासी । अहर्निशीं अनुलक्ष ॥७६॥ यालागीं सीतास्वयंवरीं । अपार मिनले मस्करी[1] । भुलेले तिच्या पालवावरी[2]। अहोरात्रीं अनुलक्ष ॥७७॥ सामवेदींचा नाद गंभीर । तेंवी अंदुवाचा गजर । नादे भुलले राजकुमर । वरणीं तत्पर भूपाळ ॥७८॥ देव म्हणती हें सीता । व्हावी आमुची देवकांता । दैत्यदानवांच्या चित्ता । आमच्या हाता हे यावी ॥७९॥ यक्ष राक्षस गंधर्वगण । नर किन्नर सिद्ध चारण । सीतास्वयंवरी कोण पण । अवघेजण पुसती ॥८०॥

विश्वामित्रांनी धनुष्य आणविले : विश्वामित्र म्हणे रायासी । आतां आणावें धनुष्यासी । रायें प्रेरिलें प्रधानासी । ते परिवारेंसीं निघाला ॥८१॥ धनुष्या मांदुस[3] अष्टचक्र । पांचशतें महावीर । ओढितां न ओढे अणुमात्र । मागें गजभार लोटिती ॥८२॥ जे जे मार्गीं भेटती त्यांसी । ते ते लाविती ओढावयासी । एवं अत्यंत प्रयासीं । धनुष्य सभेसी आणिलें ॥८३॥

धनुष्याचा राजांवर परिणाम, धनुष्यप्रताप : बाहेरी काढितांची चाप । दैत्य दानव सकंप । हें राजीं सांडिला प्रताप । वाढिवेचा[4] दर्प सांडिलो सकळीं ॥८४॥ जनक सांगे सकळांसी । हें येणेंचि त्र्यंबकेसीं । बाणें भेदिलें त्रिपुरासी । आणि दक्षयागासी विध्वंसिलें ॥८५॥ येणेंचि धनुष्येंकरीं[5] । एकवीस वेळां धरित्री । परशुरामें केली निःक्षत्री[6] । तें हें स्वयंवरीं आणिलें पणा ॥८६॥ या धनुष्यातें उचलोन । जो पुरुषार्थें वाहील गुण । त्यासी सीतेचें पाणिग्रहण । घडेल जाण त्रिशुद्धी[7] ॥८७॥ एकोनियां रायाचें वचन । तटस्थ ठेले सकळ जन । त्यामाजी पुरुष पंचानन[8]। वहावया गुण उठिले ॥८८॥ ज्यांची वाढीव अति प्रबळ । जे रणांगणीं रणकल्लोळ । राजे उठिले सबळ । नांवे सकळ अवधारा ॥८९॥

उपस्थित शक्तिमान् राजांची सूची : शिखिध्वज कुशध्वज । ताम्रध्वज गजध्वज । राम आलासे गरुडध्वज । भूभुजा[9] लाज लावावया ॥९०॥ सुरथ भरत विदूरथ । विचित्ररथ चैत्ररथ । गुप्त आलासे रघुनाथ । सीताकांत व्हावया ॥९१॥ वीरसेन वीरघ्न । भारसेन भद्रघ्न । तेथें आलासे रघुनंदन । सीतावरण करावया ॥९२॥ जयपाळ अजयपाळ । वीरपाळ विजयपाळ । राम आलासे प्रणतपाळ[10] । धनुर्बळ भंगावया ॥९३॥ चित्रकेतु विचित्रकेतु । श्वेतकेतु धुम्रकेतु । राम आलासे भक्तकेतु । गर्वघातु रावणाचा ॥९४॥ केशी कारुष कलिंग । मद्र माथुर अंग वंग । राम आलासे श्रीरंग । धनुर्भंग करावया ॥९५॥ राजे धरोनि आंगवण[11] । धनुष्या वाहूं पाहती गुण । तंव तेथें आला रावण । मूळेंवीण[12] अति गर्वी ॥९६॥

रावणाचे आगमन आणि अहंकारी भाषा : देखोनि रावणाचा यावा[13] । कंप सुटला रायां सर्वां । धाक देवां दैत्यां दानवां । हा लग्नीं मानवां अरिष्ट ॥९७॥ लोक जाले हाहाभूत । जनक झाला साशंकित । राम बैसला सावचित । रावणांतक कृतकारी ॥९८॥ गर्वें बोले रावण । मज करितां सीताहरण । येथें निवारूं शके कोण । परी पुसूं पण स्वयंवराचा ॥९९॥ रावण पुसे जनकासी । कोण पण या स्वयंवरासी । येरु म्हणे जो गुण वाहील धनुष्यासी । सीता त्यासी वरील ॥१००॥ धनुष्य वाहणें गोष्टी थोडी । महारण करूं तांतडीं । अंगा न येतां परवडी[14]। जानकी रोकडी पर्णीन ॥१॥ ऐसी बोलोनि वचनप्रौढी । मग रावण उठिला लवडसवडी[15] । सभांगणीं घातली उडी । धनुष्य तांतडीं धरूं गेला ॥२॥ तंव तळीं राहिलां

शब्दार्थ - १. संन्यासी, २. पदरावर, ३. पेटी, ४. कीर्तीचा, मोठपणाचा, ५. धनुष्याच्या मुळे, ६. क्षत्रियरहित, ७. खरोखर, ८. पुरुषश्रेष्ठ, ९. राजांना, १०. शरणागतांचा प्रतिपाल करणारा, ११. आवेश, बळ, १२. आमंत्रणावाचून, १३. येणे, १४. दुर्दशा, १५. तातडीने, घाईने.

माथा । तळवट वरी आला हाता । गर्वें न कळे लंकानाथा । पाहे सभोंवता सभेसी ॥३॥ म्हणे म्यां वाहिला गुण । सीता आणि हातीं धरून । सभेसी रावणें जिंकिला पण । वळंगोनि आपण गर्जत ॥४॥

रावणाला पाहून सीता सचिंत, ती ईश्वराची करुणा भाकते : तें देखोनिया सीता । थोर गजबजली चित्ता । म्हणे अगा हे उमाकांता । तुझे चाप सर्वथा न उचलो यासी ॥५॥ माते धरित्री ये वेळीं । रावणा नेट नेदीं पायांतळी । त्यासी तों न्यावें रसातळीं । धनुष्याच्या मुळीं घालीं भार ॥६॥ आपुला धराभार समस्त । घालावया धनुष्याआंत । रावणाचा चके[1] हात । तैसा कार्यार्थ साधावा ॥७॥ रावणातें पूर्ण छळी । ते वेगीं पावो कंकाळी । आमची कुलदेवता भद्रकाळी । धनुष्य समूळी धरून राखो ॥८॥ इंद्रियाधिष्ठात्री देवता । मज साह्य होवोत समस्ता । धनुष्य नुचलो लंकानाथा । ऐसी अशक्तता यासी यावी ॥९॥ रावणाच्या शरीरींचें पाण । मज साह्य व्हावे संपूर्ण । यासी न चढे चापगुण । तैसा क्षीण करावा ॥११०॥ आपलें चाप विसरोन । केउता गेला त्रिनयन । रावणाचें काळें वदन । करावें संपूर्ण श्रीशंकरें ॥११॥ सीता निजशक्ति आदिमाता। तिचा स्तुतिवाद ऐकतां । साह्य जाल्या इंद्रियदेवता । रावणा क्षीणता आणिली प्राणें ॥१२॥ ऐसा औट कोटी[2] भूतावळी[3] । घेवोनि आली भद्रकाळी । महादेव जटा मोकळी । धनुष्याजवळी तो आला ॥१३॥ म्हणे माझ्या स्वामीची कांता । केंवि जाय रावणाच्या हाता । क्रूर काळाग्नीच्या सत्ता । धनुष्याआंतौता प्रवेशला ॥१४॥ रावणाचेनि अदृष्टें[4] । धनुष्य जालें उफराटे । माथां बसले तळवटे । तळ तो गर्विष्ठें धरिला हातीं ॥१५॥

रावणाची फजिती व अध:पात : जेथें गर्व आणि अभिमान । तेथें अवश्य वसे अपमान । तेणें गर्वेंचि रावण । धनुष्या गुण वाहूं गेला ॥१६॥ तंव तें पूर्वींच पालथें । बळें करूं जातां उलथें । भोवंडितां न भोंवे विसां हातें । रावणाभोंवतें भोविन्नलें ॥१७॥ धरितां न धरवे महाभारी । लोटितां न लोटवे विसांहीं करीं । येऊनि आदळे उरावरी । पालथा शिरीं पडियेला ॥१८॥ रावण आदळतां भूतळीं । न्याहा[5] उठिला पाताळीं । दाही मुखीं भरली धुळी । रावण तळमळत पडियेला ॥१९॥ सभारंगण तोचि पाटा । धनुष्य तोचि वरंवटा । ऐसा रावण लाठा[6] । सभेचे चोहटा[7] लाटिला ॥१२०॥ रावण पडतां अधोगती[8]। धुळी उधळली सभेप्रती । रायांच्या तोंडीं पडली माती । जानकीच्या चित्तीं आल्हाद ॥२१॥ दहाही घरघरती गळे । वीसही वटारिले डोळे । मुखींहूनि लाळ गळे । गात्रें विकळे पडलीं पैं ॥२२॥ प्रधान धांविन्नला कैवाडें[9]। धनुष्य काढूं जातां कडे । रावणाची रगडती हाडें । अति चरफडे आक्रंदें ॥२३॥ तुम्ही साह्य नव्हां सांगाती । प्रधान नव्हेती माझे घाती[10]। रागें क्षोभला प्रधानांप्रती । क्षीणशक्ती जल्पत ॥२४॥ जनकासी म्हणे रावण । धनुष्यें माझा गेलिया प्राण । इंद्रजित आणि कुंभकर्ण । कुळनिर्दळण करिती तुझें ॥२५॥ मी रावण अति कृतांत । धनुष्यें केलें गर्वहत । जनका आतां तुझे उचित । तें त्वां निश्चित करावें ॥२६॥

जनकाकडून रावणावर उपचार : जनकासी भूतदया भारी । घायीं सांपडलिया वैरी । त्यासीही व्हावें परोपकारी । तोचि संसारीं परमार्थिक ॥२७॥ महावीर सहपरिवारीं । जनक धांविन्नला त्वरेंकरी[11] । चाप काढिलें वरचेवरी । रावणातें करी सावध ॥२८॥ उदकें शिंपिलें मुखकमळा । तेव्हां तो उठोनि बैसविला । आणोनियां शुद्धजळा । केला गुळणा[12] रावणें ॥२९॥ करोनियां शुद्धाचमन । मग केलें उदकप्राशन । होवोनियां सावधान । बैसला आपण निजासनीं ॥१३०॥

---

शब्दार्थ - १. मोह पावेल, चुकेल, २. साडेतीन कोटी, ३. भूतसमुदाय, ४. प्रारब्धकर्माने, ५. पडशब्द, ६. दांडगा, ७. चवाठ्यावर, ८. खाली, ९. कैवाराने, १०. काळ, ११. त्वरेने, १२. चूळ.

मज जाला अपमान। आतां धनुष्य वाहील कोण । ते पहावया विंदान[१] । क्रोधें रावण बैसला ॥३१॥ धनुष्या गुण न चढवितां । जनक कोणासी देईल सीता । तरी मी त्याच्या करीन घाता । क्रोधें क्षुद्रता पाहूं ठेला ॥३२॥

रावणाची दुरवस्था पाहून हा पण पूर्ण होण्याची आशा मावळली : देखोनि रावणाची दुर्दशा । मग राजींही सकळीं सांडिला धिंवसा[२] । सांडिली जानकीची आशा । चापवळसा[३] अनिवार ॥३३॥ सर्वथा चापा न चढे गुण । चढवूं जातां जाईल प्राण । मग जानकी भोगील कोण । जाल्या अपमान सभेसी ॥३४॥ एवं नरवीर राजे समस्त । धनुष्यार्थीं जाले विरक्त । आतां उठोनि श्रीरघुनाथ । चापाचा अंत पुरवील ॥३५॥ एकाजनार्दना शरण । चापें अपमानिला रावण । त्यासी श्रीराम वाहील गुण । शेखीं[४] घेईल प्राण चापाचा ॥३६॥ रामकथा अति रसाळ । श्रवणांच्या मुखा येतसे लाळ । सुखाची जिव्हा करी ळळळळ । जीवें मुखकमळ पसरिलें अर्था ॥३७॥ रामकथाक्षर पावावया । नेत्रीं सांडिल्या व्यंकट भंवया । तें कथाक्षर आलिंगावया । स्फुरती बाह्या अष्टांगे ॥३८॥ रसना[५] चाखतां कथारस । इतर रस होती विरस । ऐसी श्रीरामकथा सुरस । श्रोतीं अवकाश मज द्यावा ॥३९॥ रामकथेचा प्रताप । वर्णावया मी अति अल्प । श्रीजनार्दनकृपादीप । कथा सुखरूप स्वयें दावी ॥१४०॥ एकाजनार्दना शरण । अति रमणीय रामायण । सज्जनीं द्यावें अनुसंधान। चापभंजन श्रीरामें ॥४१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां चापकथानिरूपणं नाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥ ओंव्या ॥१४१॥

## अध्याय एकोणिसावा

### श्रीरामस्वरूप वर्णन

रामाविषयी सीतेची उत्कंठा : श्रीसद्गुरूरामचंद्राय नमः । सीतेसी सांगती सखीजन । टळलें रावणाचें विघ्न । तूं भाग्याची सभाग्य पूर्ण । आवडे तो आपण नृप लक्षीं ॥१॥ दळें बळें अति संपत्ती । धैर्य वीर्य यश कीर्ती । सखिया दाविती भूपती । सीता ते नृपती मानीना ॥२॥ श्यामसुंदर निजमूर्ती । पति तो एक रघुपती । सीतेनें निश्चय केला चित्तीं । वरकड निश्चितीं मानीना ॥३॥ सभेसी बैसला रावण । धनुष्या न चढवेचि गुण । राम करूं न शके वरण । जनकें पण कठिण केला ॥४॥

धनुर्भंगाच्या पणाबद्दल राजांना आवाहन : जो धनुष्यीं वाहील गुण। त्याचें म्यां करावें पाणिग्रहण। हा जो जनकें केला पण। अति दारुण निष्ठुर ॥५॥ धनुष्य कमठपृष्ठासम[६] कठोर[७] । राम अत्यंत सुकुमार । त्यासी केंवी होय स्वयंवर । चिंता थोर सीतेसी ॥६॥ रावण अपमानल्यापाठीं । नृपनरवीरां धाक पोटीं । धनुष्य वहावया कोणी नुठी । सभेची दृष्टी टकमक ॥७॥ तटस्थ देखोनी सभामंडळ । जनक बोलिला भूपाळ। शिवचापधारी नाहीं प्रबळ । क्षितिमंडळ निर्वीर ॥८॥

श्रीरामांना विश्वामित्रांची आज्ञा : ऐकोनि रायाचें वचन । उठावला रघुनंदन । करावया धनुर्भंजन । पुसे आज्ञापन गुरूसी ॥९॥ निर्वीर पृथ्वीतळ । हे वाक्य न साहे रामभूपाळ । गुर्वाज्ञा जाल्या सबळ । धनुष्य तत्काळ सज्जीन ॥१०॥ ऐकतां आल्हाद विश्वामित्रा । वेगीं चाप चढवीं रामचंद्रा । निंचावीं[८] सुरां वीरां नृपवरां । धनुर्धरां सकळांसी ॥११॥ गुर्वाज्ञा होतां रोकडी । रामचंद्रें घातली उडी । लक्ष्मणें अति तांतडी । कांस गाढी घातली ॥१२॥ चाप एक

---

शब्दार्थ – १. कौशल्य, २. धैर्य, ३. धनुष्याचा झपाटा, ४. शेवटी, ५. जिव्हा, ६. कासवाच्या पाठीसारखे, ७. कठिण, ८. कमीपणा आणावा.

आम्ही दोघे जण । राजे हांसतील संपूर्ण । सीताही हांसेल आपण । वीरलक्षण हें नव्हे ॥१३॥ राम म्हणे सौमित्रा राहें सावधान । जेणें चापें गांजिला रावण । त्या चापा निमेषार्धें वाहीन गुण । राजांरावणा देखतां ॥१४॥ ऐकतां श्रीरामाचें वाक्य । वचकले[1] रावणादिक । पाहतां दिसताहे बाळक । अलोलिक निजधैर्य ॥१५॥ हरचाप[2] देखतां दृष्टीं । सर्वांगीं कांटा उठी । तें सज्जावया जगजेठी । धैर्याचा पोटीं निर्धारु ॥१६॥

पण सिद्ध करण्यासाठी रामांचे आगमन, त्यामुळे झालेला परिणाम : एक म्हणती ऋषीश्वर वेडे । आपुले प्रतिष्ठेचे[3] चाडे[3] । लोकांची बाळें लळिवाडें । चापापुढें घालिती ॥१७॥ एक म्हणती श्यामसुंदर । शोभा अत्यंत मनोहर । सांडून चापारोपणप्रकार[4] । सीता सुंदर यासी द्यावी ॥१८॥ बोलती नरनारी समस्ता । यासी अवश्य द्यावी सीता । धनुष्य वाहावयाची कथा । कोणीं सर्वथा न करावी ॥१९॥ श्रीरामसीतेचा जोडा । देवें मेळविला चोखडा[5] । जनक आहे केवळ वेडा । धनुष्याचा तडा[6] गोंवितो ॥२०॥

जनक व सीतेची मानसिक अवस्था : सीता कृतनिश्चयेंसीं । स्वयें रातली[7] श्रीरामासीं । जनकमन गुंतलें रामापासीं । राम जनकासी आवडला ॥२१॥ बापलेकींचें मनोगत । श्रीरामापासीं एक होत । त्याच्या स्वरूपाचा इत्यर्थ । दोघें लक्षित एकत्वें ॥२२॥ त्या श्रीरामाची निजस्थिती । चिन्मात्रैकचैतन्यमूर्ती । अव्यक्त आलासे व्यक्ती । भक्तभावार्थी साकार ॥२३॥ जेंवी कपिलेचें[8] शुद्ध क्षीर । आळोनि करिती दध्याकार[9] । तेंचि मथूनि साचार । काढिती सार नवनीत ॥२४॥ तें ठेवितां नवनीत । होऊं पाहे विकारवंत । तें अग्नीनें करूनि संतप्त । साधिती घृत परिकर ॥२५॥ तें थिजोनि अविकारता । स्वयें भासे साकारता । कणिकारूपें अनेकता । दिसे स्वभावता घृत घृतीं ॥२६॥ तेंवी वैराग्यविवेकचतुर । नित्यानित्य निजविचार । करूनि साधिती शुद्धसार । चिदचिन्मात्रस्वरूप ॥२७॥ तेंचि स्वरूप स्वभावेंसीं । आलें साकार दशेसी । सगुण मूर्ति भासे कैसी । चिद्विलासी श्रीराम ॥२८॥ श्रीराम कौसल्येच्या उदरीं । कीं तो सबाह्य अंतरीं । राम परमात्मा चराचरीं । तो दशरथाघरीं अवतार ॥२९॥ राम अवतारींचा अवतारी । तो स्वयें आला स्वयंवरीं । सीता निजशक्ति नोवरी । पर्णावया करील उल्लास ॥३०॥ नोवरीची इच्छा स्वभावता । सुंदर वर यावा हाता । ते श्रीरामाची सगुणता । निर्धारी सीता सांगोपांग ॥३१॥ श्रीरामाचें पूर्णपण । सीताच जाणे संपूर्ण । यालागीं त्याचें सगुणपण । पाहे आपण सर्वावयवीं ॥३२॥

श्रीरामस्वरूपस्तवन : श्रीरामाची श्रीमूर्ती । वर्णितां मौनावल्या श्रुती । वेद म्हणती नेति नेती । राम शब्दार्थी अर्थवेना ॥३३॥ चाटू[10] मधुर रस वाढी । तो चाटू खातां न लाभे गोडी । तेवीं सांडून शब्दांचिया वोढी । पहावी रोकडी श्रीरामशोभा ॥३४॥ शब्दीं बोलतां राम परेश । बोलत्याचे बोल पडती ओस । मोटे बांधितां आकाश । ये हातास चौपालवी[11] ॥३५॥ आकाशाची बांधितां मोट । कर्त्याचे व्यर्थ जाती कष्ट । करितां शब्दाची खटपट । श्रीराम स्पष्ट न बोलवे ॥३६॥ राम सगुण तोचि निर्गुण । राम परमात्मा परिपूर्ण । राम चिन्मात्रैक चैतन्यघन । जगज्जीवन श्रीराम ॥३७॥ त्या श्रीरामाचें सगुणपण । बोलावयासि मी अति दीन । वाचावाचक[12] श्रीजनार्दन । आपुलें आपण स्वरूप वदवी ॥३८॥ राम सर्वांगें निजनिर्मळ । ते निर्मळीं बिंबलें नभ सुनीळ । यालागीं श्यामता सोज्ज्वळ । भासे निर्मळ निजभक्ता ॥३९॥ राम श्यामता मेघश्याम । त्या श्यामता गर्जे अहंब्रह्म । यालागीं राम मेघश्याम । बोलती निगम[13] श्रुतिशास्त्रें ॥४०॥ राम निर्मळत्वें परम । हें सुरवरां न कळे वर्म । अंगीं बिंबलें देखोनियां

---

शब्दार्थ - १. चकित झाले, २. शिवधनुष्य, ३. प्रतिष्ठेकरिता, ४. धनुष्यावर दोरी चढविण्याचा प्रकार, ५. उत्तम, ६. पण, ७. रतली, रममाण झाली, ८. काळ्या गाईचे, ९. दही, १०. पळी, ११, चौपदरी, १२. वाणीचा उच्चार करविणारा, १३. वेद.

व्योम । राम मेघश्याम म्हणताती ॥४१॥ यापरी स्वयें श्रीराम । शोभा शोभे मेघश्याम । त्याचे पदींचा पराक्रम । त्रिविक्रम आक्रमे ॥४२॥ शेषासी मुखें उदंडें[1]। चरण वर्णावया धरिलीं बंडें । त्याचिया जिव्हा जालिया दुखंडें । शेषाचेनि तोंडें न वर्णवे ॥४३॥ तेथें माझी युक्ति केउती[2]। सरों शके[3] कैशा रीतीं। बाळभाषे बाबडी स्थिती । संतोषती सुखें साधु ॥४४॥

श्रीरामाचे सामुद्रिक : ध्वज व्रजांकुश रेखा । दोहीं पायीं पद्म देखा । पाहतां पायींच्या सामुद्रिका । महापातक्यां उद्धार ॥४५॥ चहूं मुक्ती लावोनि लाज । चरणीं शोभे भक्तीचा ध्वज । वज्रें निर्दाळी कर्मबीज । स्मरणाचा सहज नित्यांकुश ॥४६॥ शोधितां सत्वाचेनि आक्रमें । दोहीं पायीं झळकतीं पद्में । तळवे आरक्त संध्यारागप्रेमें । त्या शोभा कुंकुमें लाजिजे ॥४७॥ जडजाड्या निस्तरावया त्रिगुण । वेगीं ठाकले श्रीरामचरण । घोटी जाली जी त्रिकोण । चरणीं संपूर्ण जडोनी ॥४८॥ कळावया कळसल्या चित्कळा । सरळ शोभती सोज्वळा । भक्तांची ते जीवनकळा । निजजिव्हाळा साधकां ॥४९॥ तोडरू[4] ना प्रळयगंघाळ । गजरें कांपे कळिकाळ । वांकी अंदुवांचा खळाळ । सुखकल्लोळ अहं सोहं ॥५०॥ कंदनें कदर्थलें काळचक्र[5]। तें जालें रामाचें जानुचक्र । चरणीं पावोनि सुखसार । सुरासुर स्वयें वंदिती ॥५१॥ रामाचीं जानुचक्रें देखतां । काळचक्र वंदी भक्तां । चरणसामर्थ्य रघुनाथा । वेदशास्त्रां अलक्ष ॥५२॥ लागतां रामचरणकमळा । सवेग उद्धरली अहल्या शिळा । चरणप्रसाद जिहीं घेतला । ते कळिकाळा नागविती ॥५३॥ ऊरू[6] मृदूत्वें सरळ शोभा । तेणें लाजविलें कर्दळीस्तंभा[7] । केळीच्या पोटीं वक्र गर्भा । अवक्रशोभा श्रीरामांकीं ॥५४॥ श्रीरामाचें गुह्य स्थान । पावावया सीताच संपन्न । वेद तेथें लज्जायमान । शास्त्रें संपूर्ण कचकचती ॥५५॥ त्यजोनि वासनावासासी । जे निर्लज्ज लोकलाजेसी । ते पावती रामगुह्यासी । अहिर्निशीं सुखरूप ॥५६॥ श्रीरामासी एकपत्नीव्रत । भक्त पतिपत्नी स्वयें होत। त्यासीच गुह्याचें गुह्य प्राप्त । भक्तभावार्थ अलोलिक ॥५७॥ क्षणक्षणां उदयास्त विजेसी । ते लागली रामकांसेसी । गिळोनियां निजवस्तूसी। अहर्निशीं तेजस्वी ॥५८॥ यालागीं तडतडीत पीतांबर । कांसे रविरश्मिचंद्र । रामसौंदर्या निजसौंदर्य मनोहर सर्वांगी ॥५९॥ ज्यामाजी राम सांपडे सगळा । ते लेइला भक्तिभाव मेखळा । त्यासी किंकिणीजाळमाळा शोभती सकळा सद्विद्या ॥६०॥ पावोनि श्रीरामाचें मुख । क्षुद्रघंटिका अधोमुख । मुक्तलग अलोलिक । शोभे निर्दोष कटिमेखळा ॥६१॥ अति सूक्ष्म मध्यमान[8] । होता पंचानन अभिमान । तेही राममध्य देखोन । गेले पळोन वनवासा ॥६२॥ पहावया श्रीराममध्यासी । शाहाडे जडले मेखळेसी । शेखीं भुलले श्रीरामासी । गमनागमनासी विसरले ॥६३॥ नाभीं निमग्न निजनाभीं । पूर्वी ब्रह्मा शिणला पद्मगर्भीं । तो देवोनि स्थापिला नाभी[9]। उदरारंभीं वर्तुळ ॥६४॥ ज्ञेय ज्ञाता नव्हाळी । हेचि उदरोदरीं त्रिवळी । सत्कर्मे रेखिल्या रोमावळी । हृदयकमळीं शोभती ॥६५॥ श्रीरामहृदयींचा अवकाश । घनानंदें निरवकाश । संत जडले सावकाश । त्यांसी नाश नाहीं कल्पांती ॥६६॥ समाधीचें सोलींव सुख । तेंचि रामहृदयींचें पदक । संत माणकुली अनेक । जडले देख सत्कोंदणें ॥६७॥ अनन्यभावाच्या सत्प्रीतीं । रूळे तेथें वैजयंती । सुमनमनाच्या रघुपती । माळा शोभती सहिततुळसी ॥६८॥ मुक्तसद्भाव मुक्ताफळी । पूर्णानुसंधानें ओंविली । श्रीरामकंठीं शोभली । एकावळी मुक्तांची ॥६९॥ श्रीरामाचा कंबुकंठ[10]। तेंचि वेदांचे मूळपीठ । स्वरवर्णींची वाहती वाट । तेथोनि प्रकट परमार्थ ॥७०॥ मुख्य मुळीं तो अबाहु । त्यासी शोभती अजानुबाहु । बाहूंचा पराक्रम बहु । दैत्यांचा ठाऊ निर्दाळी ॥७१॥ बामहस्तींचें

शब्दार्थ - १. पुष्कळ, २. किती, ३. कशा रीतीने योग्य, समर्थ ठरेल? ४. चातुर्ययुक्त झाल्या, ५. कष्टप्रद अवस्थेला आले, ६. मांड्या, ७. केळीच्या खांबाला, ८. कमरेचे प्रमाण, ९. भीतीपासून रक्षणाची हमी देणे, १०. शंखाकार गळा.

निजचाप । निःशेष निर्दळी पुण्यपाप । निवटी संकल्प विकल्प । कंदर्पाचा[1] दर्प समूळ छेदी ॥७२॥ बाण लखलखीत दक्षिण करीं । घायें समान भक्तवैरी । अहंममता जीवें मारी । द्वैताची उरी उरों नेदी ॥७३॥ चैतन्यतेजें अति तेजिष्ठ । अहं सोहं निःशेष आटे । तेचि श्रीरामाचे बाहुवटे । कीर्तिमुखें चोखट उपनिषदें ॥७४॥ वीर्य धैर्य जाणें । तींचि श्रीरामाचीं निजकंकणें। करीं बाणलीं पूर्णपणें । लणियां लेणें श्रीराम ॥७५॥ राममुद्रा बाणल्या हातीं । तो वंद्य होय त्रिजगती । कळिकाळ पायां लागती । चारी मुक्ती आंदण्या ॥७६॥ ऐशा दशांगुळीं दशमुद्रा । करी प्रतिपाळ दशावतारां । करीं धरील सीता सुंदरा । लंकानाथा नोकोनी[2] ॥७७॥ आजानुबाहु पंचानन। राम त्र्यंबकभंजन[3]। सभेसि रावणा गांजून । पाणिग्रहण सीतेचें ॥७८॥ श्रवणीं कुंडलें मकराकार । हा लौकिक बाह्यविचार । तेचि आकारीं निराकार । श्रवणें विकार निर्दाळी ॥७९॥ गाळींव आनंदाची मूस देख । कीं सोलींव सुखाचे हें सुख । तेंचि श्रीरामाचें श्रीमुख । जें करी निर्दोष देखत्यांसी ॥८०॥ नवल शोभा ते श्रवणांसी । नित्य मिळणी निजात्मयासी । श्रवणें देखणें निर्दोषी । अंशाअंशीं समरस ॥८१॥ श्रीरामाचा मुखमृगांक[4]। पूर्णत्वें नित्य निष्कळंक । तो देखोनियां शशांक[5] । लाजे अधोमुख स्वयें जाला ॥८२॥ पक्षा वाढे पक्षा मोडे । हें चंदासी दुःख गाढें । येवोनि चरणांगुष्ठी जडे । जग पायां पडे नखचंद्रीं ॥८३॥ जडतां श्रीरामांगुष्ठीं । चंद्रासी जाली पुष्टितुष्टी । रामचरणीं सुखाच्या कोठी । देखता दृष्टीं आल्हाद ॥८४॥ देखतां श्रीरामाचें श्रीमुख । समूळ निर्दळे जन्मदुःख । परमानंदें कोंदे सुख । हरिखें हरिख ओसंडे ॥८५॥ अकार उकार मकार स्थिती । ओंकारीं कर्मनिश्कर्म श्रुती। तैशा मुखीं दो भागीं दंतपक्तीं । चतुर्वेदोक्ती चौकिचे चारी ॥८६॥ जगाचे अधर ते अधर । राममुखीचें अधर सधर । परमामृतासी निजमाहेर । निजजिव्हार सीतेचें ॥८७॥ श्रीरामाची हनुवटी । देखतां सुख ओसंडे सृष्टी । धन्य देखत्याची दृष्टी । ते जाणे हनुवटी हनुमंत ॥८८॥ जगीं सौंदर्या शोभनिक । तेचि श्रीरामाचे निजनासिक । ते नासिकीं निर्नासिक । करील आवश्यक शूर्पणखा ॥८९॥ श्रीरामाचेनि प्राणें जाण । जगाचे विचरती प्राण । तेथें वसतां समाधान । निजजीवन वायूसी ॥९०॥ चैतन्याचें विश्रांतिस्थान । तेंचि श्रीरामाचें श्रीनयन । सबाह्य डोळस संपूर्ण । आपणा आपण देखणें ॥९१॥ देखतां श्रीरामाची दृष्टी । ब्रह्मानंदें जीव उठी । दृश्य द्रष्टा न दिसे त्रिपुटी । हेलावे सृष्टी स्वानंदे ॥९२॥ श्रीरामाची भ्रुकुटी । रची ब्रह्मांडांच्या कोटी । भ्रूविक्षेप कळिकाळ घोटी । छेदी गांठी चहूं देहांची ॥९३॥ श्रवणातें देखणें नयन । याचें नांव डोळसपण । पदार्थीं परमार्थदर्शन । तें समाधान नयनांसी ॥९४॥ श्रेष्ठ श्रीरामाचें निढळ[6] । तेणेंचि अधिष्ठान सबळ । सच्चिदानंदरेखा सरळ । शोभे कपाळ त्रिविळिया ॥९५॥ गाळूनि अहंकठिणपण । सोहं काढिले शुद्ध चंदन । तेंचि केलें रामार्पण । गंधार्चन श्रीरामा ॥९६॥ श्रद्धाकेशराचा मेळा । टिळक रेखिला पिंवळा । सप्रेमें रंगे सुरंगकळा । अक्षता निढळां शोभत ॥९७॥ श्रीराम सकळां मुकुटमणी । राम शिरोरत्न राजस्थानीं । त्याचे माथ्याचा मुकुटमणी । ऐसा कोणी दिसेना ॥९८॥ राममुकुटीं निजशोभा । राम शिरोत्ननिजगाभा । त्या श्रीरामाची मुकुटप्रभा । वचनारंभा दुर्लभ ॥९९॥ श्रीरामाच्या शिरावरतें । कांहीं उरले असतें रितें । तरी मुकुट वर्णावया तेथें । अवकाश वाचेतें सुखें असता ॥१००॥ श्रीरामावरतें कांहीं । सर्वथा रितें उरलें नाहीं । मा मुकुट वानावा कोणे ठायीं । वाचेनें कायी बोलावें ॥१॥ श्रीरामाचा निजप्रताप । नित्यत्वें निर्विकल्प। तोचि शिरीं मुकुट सद्रूप । चित्स्वरूप शोभत ॥२॥ यालागीं रामाचें माथां । लेणियाचें लेणे सर्वथा । श्रीमुकुटत्वें श्रीरघुनाथा । अंगें निजांगता शोभवी ॥३॥ जेंवी सोनियाचें सोनेंचि कोंदणें । तेंवी श्रीरामा श्रीरामचि लेणें । हें स्वयें

---

शब्दार्थ - १. मदनाचा, २. पराभूत करून, ३. शिवधनुष्य मोडणारा, ४. मुखचंद्र, ५. चंद्र, ६. कपाळ.

सीताचि लक्षूं जाणे। इतराचें जाणणें दिवा[1] खद्योत[2] ॥४॥ सीतेचें सद्रूपपण। स्वयें श्रीराम जाणे आपण। श्रीरामाचें पूर्णपर्ण। जाणे संपूर्ण स्वयें सीता ॥५॥ येरायेरांची ऊणखूण। दोघे जाणती संपूर्ण। एकाजनार्दना शरण। चापनिर्दळण अवधारा ॥१०६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीरामस्वरूपवर्णनं नाम एकोनविंशतितमोऽध्याय: ॥१९॥ ॥ ओव्या ॥१०६॥

## अध्याय विसावा

### श्रीराम-सीता विवाह

श्रीरामचंद्रगुरवे नम: ॥ श्रीरामाचें पूर्णपण। रूपरेखागुणलावण्य। देखोनि सीतेचें वेधलें मन। सर्वथा आन[3] नावडे ॥१॥ सांडोनियां चंद्रामृत। चकोर अन्य न सेवित। तेंवी सांडूनि रघुनाथ। सीतेचें चित्त आन न मानी ॥२॥ जनकें देखोनियां रघुनाथ। चित्तीं आल्हाद अत्यंत। जानकी द्यावी निश्चितार्थ। साशंकित धनुष्यार्थीं ॥३॥

**श्रीरामांना पाहून सभाजनांची अनेकविध अवस्था :** सभास्थितांचे नयन। रामरूपीं अति निमग्न। रावणासी पडलें मोहन। तटस्थ जन श्रीरामें ॥४॥ श्रीराम देखोनि ऋषिपंक्तीं। अवघे आश्चर्य मानिती। सीता द्यावी रघुपतिप्रती। मानलें चित्तीं सर्वांसी ॥५॥ पुढील कार्य अति कठिण। कैंवी धनुष्यासीं वाहील गुण। कळवळती सकळ जन। चाप बंधन[4] लग्नासी ॥६॥ सत्य सीतेचा भावार्थ। राम अंतर्यामी समर्थ। करावया सकळांचे मनोगत। चापभंगार्थ चालिला ॥७॥ मागें ठेवोनि लक्ष्मण। राम चालिला सत्राण[5]। देखोनि दचकला रावण। हा धनुष्या गुण वाहील ॥८॥ हा तंव दिसताहे बाळक। याचा पराक्रम अलोकिक। घायें मारीचास लाविली शीक[6]। मारिला नि:शेष सुबाहू ॥९॥ म्लान देखोनि दशवक्त्रा[7]। उल्लास थोर विश्वामित्रा। वेगु करीं रामचंद्रा। धनुर्धरां लाजवीं ॥१०॥

**उपस्थितांना वंदन करून राम धनुष्याकडे जातात :** तेणें हरिखला रघुनंदन। विश्वामित्रा केलें नमन। द्विजांचे घेवोनि आशीर्वचन। दिधला सन्मान सभेसी ॥११॥ जनक अतिशयें सज्जन। रामें त्यासी केलें नमन। बाहूंसी आलें स्फुरण। चापग्रहण करावया ॥१२॥ हेळसोनि सभा समस्त। मी एक सामर्थ्यें समर्थ। रावणाऐसा अति गर्वार्थ। श्रीरघुनाथ न करीतसे ॥१३॥ देवोनि सकळांसी सन्मान। वृद्धवृद्धां करोनि नमन। अति विनीत रघुनंदन। चापग्रहण करूं आला ॥१४॥

**धनुष्याची तपस्या :** धनुर्ष्यी अत्यंत जडपण। तेंही सांगेन मी निरूपण। श्रोतीं द्यावें अवधान। पूर्वलक्षणपर्यावो ॥१५॥ चाप सदाशिवाचे हातीं। त्यासी जडत्वा शिवशक्ती। चापें चापजडत्वप्राप्ती। जे बोलती ते महापापी ॥१६॥ चाप अति दुष्ट निर्दळी। तें पाप नये चापाजवळी। शिवरामनामे पाप जाळी। मग निर्दळी दुष्टातें ॥१७॥ चापें बहुत केले तप व्रत। म्हणोनि पावलें शिवाचा हात। शिवहस्तें अति पुनीत। यालागीं रघुनाथ हातीं धरी ॥१८॥ शिवाचें शिवचाप अपूर्व। तें कैंवी उचलूं शकती जीव। तेथें अधिष्ठानें वसे शिव। चापीं जडभाव शिवशक्तीं ॥१९॥ शास्त्रमर्यादा ते ऐसी। जो जड तोचि पापराशी। ते जडत्व नाहीं चापासी। धन्यत्व त्यासी शिवशक्तीं ॥२०॥ धनुष्य उचलितां रावण। चापीं प्रवेशे त्रिनयन। तेणं तो अपमानिला पूर्ण। चापीं जडपण शिवशक्तीं ॥२१॥ कोदंडाचा[8] निजभावार्थ। शिवहस्तें मी अति पुनीत। श्रीरामहस्तें परममुक्त। होईन निश्चित स्वयंवरीं ॥२२॥ राम सदा शिवातें ध्याय। शिव वंदी श्रीरामपाय। तेणें चापाचें जडत्व जाय। पुष्पप्राय तें जालें ॥२३॥ असो हे

शब्दार्थ - १. दिवसाला, २. काजवा, ३. अन्य दुसरी गोष्ट, ४. अडथळा, आडसर, ५. वेगाने, जलदीने, ६. शिक्षा, अद्दल, ७. दहा मुखे असलेल्या, ८. धनुष्याचा.

धनुष्याची कथा । स्वयंवरीं वरावी सीता । हेंचि कार्य रघुनाथा । तत्कार्यार्थी चाप पाहे ॥२४॥

**एका दृष्टिक्षेपात धनुष्याच्या शक्तीचे श्रीरामाकडून हरण :** रामें अवलोकितां चाप । चाप जालें निष्पाप । हरला जडजाड्यसंताप । स्वयें सुखरूप उचललें ॥२५॥ श्रीराम पाहे जयाकडे । त्याचें आकल्प जडत्व उडे । तेथें काय धनुष्य बापुडें । जडत्व पुढें उरावया ॥२६॥ श्रीराम म्हणतां वाचे । जड संसार तरती साचे । दर्शन जालिया त्या रामाचें । जडत्व कैचें धनुष्यासी ॥२७॥ धनुष्याचेंही मनोगत । लागल्या श्रीरामाचे हस्त । मी होईन कृतकृतार्थ । कर्मनिर्मुक्त श्रीराम ॥२८॥ चापासी उपजे अनुताप । ऐसा श्रीरामप्रताप । अनुतापें जडत्व गेलें पाप । रामें सकृप पाहिलें ॥२९॥ यापरी श्रीरघुनाथें । अवलोकोनि धनुष्यातें । आकळिलें वामहस्तें । सज्ज त्वरितें करावया ॥३०॥

विश्वामित्रस्तु धर्मात्मा श्रुत्वा जनकभाषितम् । अभ्यभाषत काकुत्स्थं प्रहृष्टेनांतरात्मना ॥१॥

**श्रीरामांची कुमारावस्था पाहून जनक साशंक :** धनुष्य श्रीरामें धरितां हातीं । थोर आशंका जनकाचे चित्तीं । तो येवोनि मुनीप्रती । अति काकुळती बोलत ॥३१॥ राजा म्हणे महाऋषी । राम सौकुमार्याची राशी । जेणें घोळशिलें रावणासी । तें चाप यासी केंवी सज्जे ॥३२॥

**विश्वामित्रांचे जनकाला आश्वासन :** ऐकतां रायाचें शंकावचन । विश्वामित्र निःशंक पूर्ण । काय बोलिला गर्जोन । सभेचे जन ऐकतां ॥३३॥ ऐकें बापा रघुनंदना । पुरुषामाजीं पंचानना[1] । धनुष्य चढवीं आंगवणा । सावधाना निजवृत्तीं ॥३४॥ तूं तंव पुरुषार्थी रघुनाथ । धनुष्य वाहावें निमेषार्धांत । जनकजानकींचा मनोरथ । कृतकार्यार्थ करावा ॥३५॥

**श्रीरामाचा आत्मविश्वास :** ऐकोनि सद्गुरूचें वचन । धनुष्य पाहे रघुनंदन । वामहस्तें आकळून । चढवावया गुण सज्ज जाला ॥३६॥ राम म्हणे ऋषीप्रती । तुझिया वचनें कृपाप्राप्ती । धनुष्य वाहणें कार्य किती । वृथा कुंथती नरवर्य ॥३७॥ हे शंकराचें दिव्य चाप । गुण वाहणे कार्य अल्प । आतां पहा माझा प्रताप । करीन आरोपण शराकर्षणेंसीं[2] ॥३८॥

बाढमित्यब्रवीद्राजा मुनिश्च समभाषत । लीलया स धनुर्मध्ये जग्राह वचनान्मुनेः ॥२॥

पश्यतां नृसहस्राणां बहूनां रघुनंदनः । आरोपयत्स धर्मात्मा सलीलमिव तद्धनुः ॥३॥

ऐसें बोलता रामचंद्र । हर्षें उल्लासे विश्वामित्र । म्हणे धन्य धन्य तुझें वक्त्र । तूं प्रतापसमुद्र रविवंशी ॥३९॥

**श्रीरामांनी एका हातानेच धनुष्य उचलले :** तुझिया वचनासाठी । मज दिधलिया अयुतकोटी । म्हणोनियां पाठी थापटीं । धनुष्य मुष्टीं आकर्षीं ॥४०॥ जनक म्हणे रघुनाथा। मजही ऐसा भ्रम होता । हरधनुष्य आकळिता[3] । वीर सर्वथा असेना ॥४१॥ तो त्वां वाढिवेचा[4] माथां । उजळ केला सभेदेखतां । किती वानूं पैं पुरुषार्था । धन्य रघुनाथा वाढिव ॥४२॥ बोलिलासी प्रताप-गरिमा । ते सत्य करावी श्रीरामा । संपादीं शीघ्र चापकर्मा । पुरुषोत्तमा रघुवीरा ॥४३॥ गुरु श्वशुर उभयवचन । ऐकोनिया रघुनंदन । धनुष्यीं वाहावया गुण[5] । चाप संपूर्ण आकळिलें ॥४४॥ अति अतुर्बळी[6] रघुनाथ । न लावितां दुसरा हात । एकेंचि हातें वाहिलें शीत[5] । जालें विस्मित सुरासुर ॥४५॥ चाप टणत्कारितां करतळीं । नांदे रावणा दांतखिळी । राजे मूर्च्छित भूतळीं । बैसली टाळी दिग्गजांची ॥४६॥ धनुष्य ओढितां पूर्ण कानाडी । अति कडाडीं भंगलें ॥४७॥

**धनुर्भंगाच्या प्रचंड आवाजाने भयावह परिणाम :** नादाचेनि घन घर्घरारीं । बैसलीं वीरांची दांतेरी । कीरकरोनि वाजिकुंजरीं[7] । उभीं शरीरें उलंडलीं ॥४८॥ धनुर्भंगाचे कडकडाटी । नादें

शब्दार्थ - १. सिंहा, श्रेष्ठा, २. बाण ओढून, ३. उचलणारा, ४. कीर्तीचा, ५. दोरी, ६. महाबलवान्, ७. घोडे व हत्तींनी.

दुमदुमिली सृष्टी । तडा पडूं पाहे मेरुपृष्टीं । निमटे[1] दृष्टी काळाची ।।४९।। कोटिविजू तुटोनि पडे । चाप कडाडी तेणें पाडें[2] । सुर नर किन्नर जाले वेडे । वायु उडे तेणें नादें ।।५०।। नादाचिये अत्यंत प्रौढी । पृथ्वी गेली चिरढोविरढी । नभीं नक्षत्रां पातझाडी । पडिलीं बुडीं डळमळिता ।।५१।। उद्भट नादाची गति कैसी । पक्षी विसरले पळावयासी । भ्रमें भ्रमती ते आकाशीं । गति सर्वांची खुंटली ।।५२।। काळें प्राण्यांचा घ्यावा प्राण । काळ पळाला नादाभेणें[3] । आतां येथें मारिता कोण । काळा आकर्षण श्रीरामें ।।५३।। चापखंड पडतां बुडीं । शेष अत्यंत तडफडी । वराहाची दाढी तडाडी । कूर्में गाढी पृष्ठी केली ।।५४।। ऐसीं दडपलीं सप्त पाताळें । उंचबळलीं समुद्रजळें । शेषशयन पैं आंदोळे । मेरु कुळाचळें पैं कांपती ।।५५।। दिवि कंप भूमिकंप । सत्यलोकीं[4] चळकांप । रामें भंगिलें शिवचाप । अति प्रताप तिहीं लोकीं ।।५६।। जनक आणि विश्वामित्र । राम आणि सुमित्र । यांचेचि सावधान नेत्र । येर सर्वत्र मूर्च्छित ।।५७।। या चौघांही वेगळी । सावधान पाहे जनकबाळी । देखोनि रामप्रताप बळी । उताविळी वरावया ।।५८।। शिवचापाचें मनोगत । रामहस्तें मी परम मुक्त । कडकडाट नव्हे व्यर्थ । चाप गर्जत स्वानंदें ।।५९।। आनंदनाद अति उद्भट[5] । नादें दुमदुमिलें वैकुंठ । तेणे कोंदलें कैलासपीठ । नादें नीळकंठ[6] डुल्लत ।।६०।। चापनिर्मुक्त आनंदगहिंवर । तेणें उलथला क्षीरसागर । शेषशयना[7] आनंद फार । स्वर्गीं जयजयकार देवांचा ।।६१।। रामप्रतापआनंदद्वारा । अकार उकार मकारा । आनंद कोंदला अर्धमात्रा । राया रघुवीरप्रतापें ।।६२।। लागतां श्रीरामाचा हस्त । शिवचाप झाले परम मुक्त । तोही मुक्तीचा अर्थ । श्रीरघुनाथप्रतापें ।।६३।। लागतां श्रीरामाचें चरण । सद्यःमुक्त[8] होती पाषाण । त्याचेनि हस्तें चापग्रहण । मुक्ति संपूर्ण श्रीरामें ।।६४।। करितां रामनामस्मरण । जडासी मुक्ति वरी आपण । त्याचेनि हस्तें चापग्रहण । मुक्ति संपूर्ण श्रीरामें ।।६५।। शिवचापा परम मुक्ती । जनकसंशया विनिर्मुक्ती । जानकीलोचना नित्यतृप्ती । ते श्रीराममूर्ति स्वयंवरी ।।६६।। रावणगर्वाची निर्मुक्ती । आशापाशनिःशेषनिवृत्ती । राजाभिमाना नित्यमुक्ती । ते श्रीराममूर्ति स्वयंवरीं ।।६७।। वेदानुवादा वचनानुमुक्ती । शास्त्रानुवादा युक्तिप्रयुक्ती । जानकीलोचन दृश्यनिर्मुक्ती । ते श्रीराममूर्ति स्वयंवरीं ।।६८।। जनसमुदाया संदेहनिर्मुक्ति । सुरसमुदाया बंधमुक्ति । भक्तसंतापनिजात्ममुक्ति । ते श्रीराममूर्ति स्वयंवरीं ।।६९।।

**सीतेची मनःस्थिती :** श्रीरामप्रतापाचा सोहळा । देखावया भाग्य कैचें सकळां । अंध पडिलें त्यांच्या डोळां । जनकबाळा सुख भोगी ।।७०।। श्रीरामसुखाचा सोहळा । देखोनि जानकी निवाली डोळां । त्याचे कंठीं घालाजया माळा । उताविळी भावार्थे ।।७१।। चापभंगाचे नाद कोटी । शनैः शनैः शमले नभाचे पोटीं । चेतनोपलब्ध[9] जाली सृष्टी । उघडली दृष्टी जनांची ।।७२।। जन जाले सावधान । सभा बैसली स्वस्वस्थान । देखोनियां धनु भग्न । विस्मित मन सर्वांचें ।।७३।। गेला जनकाचा संदेहो । राम अतुर्बळी महाबाहो । जाला सर्वार्थी निःसंदेहो । जाणोनि राव बोलत ।।७४।।

**जनकाचे धन्योद्गार :** जनक अत्यंत उल्लासेंसीं । हरिखें बोले विश्वामित्रासी । राम दाशरथि सूर्यवंशीं । पूर्वीं बहुतां ऋषीं सांगितलें मज ।।७५।। निजतेजें अत्यद्भुत । अचिंत्यानंत अति समर्थ । दृष्टीं देखिलें इत्यंभूत । प्रतापवंत श्रीराम ।।७६।। जेणें शिवाचें कोदंड । अवलीळा[10] केलें दुखंड । श्रीरामप्रताप प्रचंड । काळे तोंड रावणाचें ।।७७।। पूर्ण न भरतां कानाडीं । हरचाप भंगलें कडाडीं । त्याच्या प्रतापाची प्रौढी । कोणें केवढी वानावी ।।७८।। जनककुळींची कुळात्मजा। होईल श्रीरामाची भाजा[11] । तेणें वंश सार्थक माझा । हा धर्म तुझा ऋषिवर्या ।।७९।। विश्वामित्र तूं धर्मात्मा । तुझेनि धर्में भेटी श्रीरामा । तुझेनि निष्कृति सर्वां कर्मां । राम

---

**शब्दार्थ -** १. बंद होई, २. त्यासारखे, ३. त्या नादाच्या भीतीमुळे, ४. स्वर्गांत, ५. मोठा, ६. शंकर, ७. विष्णूला, ८. तत्काल, ९. सावध झाली, १०. सहज, ११. स्त्री.

परमात्मा । मज सुहृद ॥८०॥ तुझें रूढ नाम विश्वामित्र[1]। परी तूं माझा परम मित्र । राम परमात्मा परम पवित्र । सुहृद स्वतंत्र तुझेनि ॥८१॥ माझा पूर्वकृत संकल्प । सीता अमूल्य प्रतापचाप । तो त्वां केला निर्विकल्प । सत्यसंकल्प श्रीराम ॥८२॥ स्वयंवरींचा पण कठीण। राजे भंगले सहरावण । त्यासी श्रीरामें वाहिला गुण । सीतावरण प्रतापीं ॥८३॥ सीतेसी श्रीराम भ्रतार । कार्यकरिता विश्वामित्र । भलें जाणसी ब्रह्मसूत्र । अति पवित्र ऋषिवर्या ॥८४॥ विश्वामित्राचे चरणीं माथा । ठेवोनि जनक होय बोलता । प्राणापरीस पढियंती[2] सीता । ते म्यां रघुनाथा अर्पिली ॥८५॥ आजि माझा याग सफळ । आजि माझें पावन कुळ। आजि सीतेचें भाग्य अनुकूळ । सुखकल्लोळ श्रीरामें ॥८६॥ माझी कन्या अगुण सगुण । सीता केली रामार्पण । विश्वामित्रा तूं सज्ञान । वेगीं लग्न लावावें ॥८७॥ ऐसी जनकाची विनवणी । विश्वामित्रें ऐकोनी । बरवें म्हणोनि प्रतिवचनीं । उल्हासोनी बोलिला ॥८८॥

सीतेकडून रामाला माळ समर्पण : ऐकोनि ऋषिरायाची गोष्टी। सीतागज प्रेरिला घडघडाटीं। माळा घालावया श्रीरामकंठीं । आली गोरटी उल्लासें ॥८९॥ जें सीतेचे मनीं होतें । तेंचि केलें रघुनाथें। वेगीं बरावया त्यातें । आनंदें अदभुतें पैं आली ॥९०॥ घेवोनि चिद्रत्नांची माळा । आनंदें आली जनकबाळा । देखतां सकळिकां भूपाळां । घाली गळां श्रीरामाच्या ॥९१॥ होतां डोळियां डोळेभेटी। लाज विराली उफराटी । आनंदें वोसंडली सृष्टी । सुटल्या गांठी चहूं देहां ॥९२॥ सर्वेचि पाहे सावधान । डोळियां डोळे जाले वरण । प्राणें प्राणा परिणयन[3] । लागलें लग्न जीवीं शिवा ॥९३॥ चापें वीराभिमाना अस्तु । मध्यान्हीं तपे आदित्यु । सीता वरावया रघुनाथु । आला अभिजितु सुमूहूर्तीं ॥९४॥ लग्नघटिका पाहे भास्वत । वाचा राहिल्या निजमौनांत । स्वबोध सावधान सांगत । काळ सावचित दोहीं भागीं ॥९५॥ धनुर्भंगाच्या गजरांत। अंतःपट निर्मुक्त । भावार्थ ॐपुण्या सांगत । वेगीं रघुनाथ वरावया ॥९६॥ ऐसा समय साधूनि उचित । सांडोनि उभयपक्षार्थ । करोनि अभिमानाचा अंत । सीता रघुनाथ वरियेला ॥९७॥ येरयेरां पाहतां अति प्रीतीं । सुटल्या चिदचिन्महाग्रंथी । निजऐक्याच्या बहुल्याप्रती । दोघे बैसती एकात्मता ॥९८॥ वोहरें[4] पाहतां परस्परां । नोवरीमाजी दिसे नोवरा । नोवरियाआंगी दिसे सुंदरा । वरिलें वरा या स्थितीं ॥९९॥ सीता श्रीरामीं घालिता माळा । तेचि क्षणीं त्याचि काळा । रावणा वरिलें अवकळा[5] । निढळीं टिळी काळिमेचा ॥१००॥ अवकळा बैसतां पाठीं । रावण अपमानिला सृष्टीं । रामप्रताप देखतां दृष्टी । रावणाच्या पोटी धुकधुक ॥१॥

इतर उपस्थितांना परमानंद : विजयी जाला रामचंद्र । हरिखें नाचे विश्वामित्र । घेवोनि ऋषींचा संभार । तृप्तितत्पर स्वानंदे ॥२॥ एक रोडके एक बोडके । एक ते कवळ सुडके । अवघे नाचती हरिखें । सीता रघुटिळकें पर्णिली ॥३॥ आनंदें नाचती आघवे । झेलिती गोपीचंदनाचे रवे । घोत्रें झोलिती घडिपालवे । सीता राघवें पर्णियेली ॥४॥ एक ओंवाळिती अंगवस्त्रें । एक ओंवाळिती जुनी धोत्रें । एक ओंवाळिती दर्भपवित्रें । सीता रामचंद्रें जिंकिली ॥५॥ एक ओंवाळिती कौपीन[6] । एक ओंवाळिती कुशासन[7] । एक ओवाळिती कृष्णाजिन[8] । रघुनंदन निजविजयी ॥६॥ मंत्री गर्जती ऋषीश्वर । स्वर्गीं सुरवरीं जयजयकार । सुमनांचे वर्षती संभार । रामचंद्र निजविजयी ॥७॥ सुखाचिया अति तांतडीं । देव उठिन्नले लवडसवडी । उभविती हरिखाची पैं गुढी । राम बांधवडी सोडवील ॥८॥ जनकाच्या महाद्वारीं । त्राहाटिल्या निशाणभेरी । गगन गर्जे मंगळतुरीं । जयजयकारीं निजगजरें ॥९॥ विश्वामित्रें उल्लासता । रथीं वाहोनियां

---

शब्दार्थ - १. विश्वाचा अमित्र, शत्रू, २. प्रिय, लाडकी, ३. लग्न, ४. वधुवरांनी, ५. दुर्दशेने, ६. लंगोटी, ७. दर्भासन, ८. हरिणाचे कातडे.

रामसीता । भेटावया दशरथा । होय निघता सवेग ॥१०॥ सीता जिंकिली आपण । उल्लासें नाचे लक्ष्मण । अश्ववाग्दोर धरोनि पूर्ण । रथारोहण तेणें केलें ॥११॥ विश्वामित्राचे अधीन । श्रीरामसीतेचें गमन । देखोनि जनक झाला लीन । घाली लोटांगण ऋषिराया ॥१२॥ विश्वामित्रा तू गुरुत्वें पूर्ण । स्वयंवरीं केलें सीतावरण । आतां करावें पाणिग्रहण । विधियुक्त लग्न ऋषिवर्या ॥१३॥ जनक म्हणे विश्वामित्रा । उभयपक्षीं तू सोयरा । जाणोनि शास्त्रविचारा । येथें वधूवरां राहवावें ॥१४॥ जनकाची निजकांता । सुमेधा सती पतिव्रता । तीही पाहूं धांवे रघुनाथा । वामांगी सीता बैसवोनी ॥१५॥ आणावें दशरथ भूपाळा । करावा संभ्रमें[1] सोहळा । सुख द्यावें दोहीं कुळां । ऋषिनिर्मळा कृपाळुवा ॥१६॥ ऐकोनि जनकाची विनंती । कौशिक सुखावला चित्तीं । राहविला सीतापती । ऋषिपंक्तिसमवेत ॥१७॥ धनुर्भंगें सीतावरण । समूळ जालें निरूपण । आतां रामसीतापाणिग्रहण । लग्नविधान अवधारा ॥१८॥ एकाजनार्दना शरण । प्रकृतिपुरुषां पाणिग्रहण । पुढें रसाळ निरूपण । श्रोते सज्ञान परिसोत ॥११९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां धनुर्भंगसीतावरणं नाम विंशतितमोऽध्याय ॥२०॥ ओंव्या ॥११९॥ श्लोक ॥३॥ एवं ॥१२२॥

## अध्याय एकविसावा

### दशरथाचे मिथिलेस आगमन

रामसीतेचे पाणिग्रहण : श्रीसद्‌गुरूरामचंद्राय नमः॥ सीतेचें रामासीं लग्न । वचन ऐकोनि रावण । न दाखवीच काळें वदन । गेला निघोन अधोमुखें ॥१॥ देखोनि श्रीरामप्रताप । राजे जाले सकंप । तिहीं सांडोनियां दर्प । गेले नृप निजनगरा ॥२॥ यापरी राजे राक्षस अनेक । समप्रतापें केले विमुख । तेणें जनकासी अत्यंत सुख । परम हरिख[2] लग्नाचा ॥३॥ राजा म्हणे विश्वामित्रासी । शीघ्र आणावया दशरथासी । मी धाडितों प्रधानासी । परी तो त्यासी मानीना ॥४॥

जनक उवाच–

भवतोऽनुमतेर्ब्रह्मन् शीघ्रं गच्छंतु मंत्रिणः । मम कौशिक भद्रं ते त्वयोध्यां त्वरिता रथैः ॥१॥

जनकेन समादिष्टा दूतास्ते शीघ्रवाहनाः । त्रिरात्रमुषिता मार्गे तेऽयोध्यां प्राविषन्पुरीम् ॥२॥

जनकाच्या विनंतीवरून विश्वामित्र अयोध्येत दूत पाठवितात : ऐक ऋषिवर्या कौशिका । तुझी नसतां पत्रिका । दशरथ न मानी ब्रह्मादिकां । तेथें या मशका कोण पुसे ॥५॥ तुझी न लभतां संज्ञा[3] । वसिष्ठ कदा नये लग्ना । ऐसें जाणोनि सर्वज्ञा । द्यावी अनुज्ञा पत्रेंसीं ॥६॥ आमच्या तुमच्या एकात्मता । पत्र लिहावें विनीतता । सीता देऊं केली रघुनाथा । अति पुरुषार्था देखोनी ॥७॥ रामप्रतापें अति श्रेष्ठ । पत्र लिहावें अति स्पष्ट । जेणें सुखावे श्रीवसिष्ठ । नृप संतुष्ट अजात्मक[4] सुखें ॥८॥ ऐकोनि जनकाचें वचन । विश्वामित्र सुखसंपन्न । पाचारोनियां प्रधान । अनुज्ञानपत्रिका ॥९॥ आणिकांचे तें निर्जीव पत्र । येथें सचिव तोचि सजीव पत्र । लिहिता वरिष्ठ विश्वामित्र । परम पवित्र त्याचेनि ॥१०॥ क्षराक्षराहूनि परती । श्रीरामाची निजमूर्ती । करोनि पत्रिकासमाप्ती । प्रधानाहातीं दिधली ॥११॥ पत्रिकेचा अर्थ श्रेष्ठ । वाचूं जाणे एक वसिष्ठ । आणिकां आकळितां अति कष्ट । होईल स्पष्ट अयोध्येसीं ॥१२॥ प्रेमकुंकमें अति प्रीतीं । पत्रिका शोभे शोभनस्थितीं । ज्याचें प्राधान्य त्रिजगतीं । त्या प्रधानाहातीं दिधली ॥१३॥

अयोध्येत जनकदूतांचे आगमन : बैसला मनोरथरथीं । चारी वारू चहूं पुरुषार्थी । मनासी ज्याचेनि निजगती । तोचि सारथी धुरेसी ॥१४॥ ऐसिया सन्नद्ध निजस्थितीं । पाठविला

शब्दार्थ – १. लगाम, २. उत्साहपूर्वक, ३. खूण, ४. अजाचा मुलगा दशरथ.

शीघ्रगतीं । तो पावला तिसरे वस्ती । वस्तीची स्थिती अवधारा ॥१५॥ प्रथम वस्ती श्रवणमननपुरीं । दुजी निदिध्यासनगरीं । तिसरी वस्ती साक्षात्कारीं । अयोध्यापुरीं पावला ॥१६॥ अयोध्या प्रथममोक्षपुरी । अजाचा पुत्र राज्य करी । ते श्रीरामाची निजनगरी । प्रधान तेथवरी पावला ॥१७॥

सभेत प्रधानाचे निवेदन : दशरथसभा वसिष्ठें गाढी । ती पुढें इंद्रसभा बापुडी । प्रधानें देखोनि आवडीं । उभविली गुढी विजयाची ॥१८॥ सीता अत्यंत सुंदरी । हरचापभंगें श्रीरामा वरी । प्रधान वाधावा[१] फोकारीं । घरोघरीं आल्हाद ॥१९॥ हरधनुष्य न पुरे ओढी । ओढितां भंगलें कडाकडीं । धाकें रावण एडिला बुडीं । सभा बापुडी मूर्च्छित ॥२०॥ धनुष्याची कडाडी । मूर्च्छित रायांचिया कोडी । कृतांताची[२] वळली मुरकुंडी । धाके पोटीं कळिकाळ ॥२१॥ सद्गुरू[३] कौशिकें अभ्यासिले । रामलक्ष्मण सुविद्य भले । दादुल्याचे ते दादुले । यश पावले तिहीं लोकीं ॥२२॥ जनकनेम अति प्रबळ । सीतेचे लग्नीं शिवचापबळ । जो कोणी सज्जील सबळ । त्यासी जानकी माळ घालील ॥२३॥ त्याही जनकाच्या नेमातें । सिद्धि पावविलें त्या समर्थें । सभेसी गांजोनि समस्तांतें । सीता रघुनाथें जिंकिली ॥२४॥

दशरथास व त्याच्या प्रजेस आनंद : प्रधानाचे सुखोत्तरीं । सभा गर्जे जयजयकारीं । त्राहाटिल्या निशाणभेरी । मंगळतुरीं आल्हाद ॥२५॥ गुढिया उभविती घरोघरीं । परमानंदें बोलती नरनारी । श्रीरामें जनकाच्या स्वयंवरी । सीता सुंदरी पर्णियेली ॥२६॥ सांगोनि श्रीरामाची ख्याती । वर्णूनी श्रीरामाची कीर्ती । प्रधानें त्या सभेप्रती । घातलें क्षितीं लोटांगण ॥२७॥ अति आल्हाद दशरथासी । सन्मानिलें प्रधानासी । मुकुट कुंडलें देवोनि त्यासी । वसिष्ठापासीं बैसविला ॥२८॥ रायें फोडोनियां भांडारें । दाने देतो उदार करें । दिधलीं गाईचीं खिल्लारें । कणकोठारें[४] द्विजांसी ॥२९॥ राजा निमग्न परमानंदीं । वसिष्ठ सुखावला त्रिशुद्धी । प्रधान अत्यंत सुबुद्धी । पत्र ते संधीं ओपिलें ॥३०॥ विश्वामित्राची निजयुक्ती । सर्व सिद्धींच्या सिद्धर्थीं । आधीं सद्गुरूसी विनंती । मग भूपतिकार्यार्थ ॥३१॥

विश्वामित्रांची निमंत्रणपत्रिका पाहून वसिष्ठांना आनंद : वसिष्ठ वाचितां पत्र । रामप्रताप अति विचित्र । तेणें सजले झाले नेत्र । धन्य विश्वामित्र तो म्हणे ॥३२॥ धन्य दशरथाचें भाग्य । आम्ही भाग्याचे सभाग्य । धन्य जानकीचें अष्टांग । रामअर्धांग पावली ॥३३॥ पूर्ण अवतार बाळलीळा । बाळपणीं प्रताप आगळा । धन्य जानकी जनकबाळा । ब्रह्मपुतळा निजकांत ॥३४॥ ऐसी पत्रिकेची स्तुती । वसिष्ठें केली अति प्रीतीं । काय लिहिलेंसे पत्रार्थीं । सावधान श्रोतीं परिसावें ॥३५॥ ॐ नमो स्वामी वसिष्ठा । निजज्ञानें ज्ञानश्रेष्ठा । परमानंदें अति प्रतिष्ठा । विनंती वरिष्ठा अवधारीं ॥३६॥ तुझी आल्हादें व्हावी भेटी । हे जनकाची उत्कंठा मोठी । वोहरें पहावीं कृपादृष्टीं । लग्नसंतुष्टी तुझेनि ॥३७॥ सीता श्रीरामें धनुर्वेधीं । स्वयंवरीं जिंकिली त्रिशुद्धी । तूं आलिया कृपानिधी । लग्नसिद्धी होईल ॥३८॥ प्रकृतिपुरुषां पाणिग्रहण । तुझेनि होतसे संपूर्ण । तूं कारणा निजकारण । लग्न सुलग्न तुझेनि ॥३९॥ दशेंद्रियदशरथा । तूंचि कर्ता तूंचि नियतां । पाणिग्रहणीं रामसीता । तूं मुख्य कर्ता कुळगुरू ॥४०॥ तुझी आज्ञा अति समर्थ । गगनी छाटी[५] वंदी आदित्य । तुझेनि रघुवंश सनाथ । लग्न समाप्त तुझेनि ॥४१॥ यापरी वसिष्ठासि विनंती । विश्वामित्रें लिहिली स्वस्थिती । जनक दशरथ भूपती । पत्रयुक्तीं प्रार्थित ॥४२॥ स्वस्ति श्रीअजात्मजा । सूर्यवंशवंशध्वजा । दशरथा महाराजा । श्रीराम तुझा निजविजयी ॥४३॥ श्रीराम प्रतापें आगळा । स्वयंवरीं वरिली जनकबाळा । त्यांच्या लग्नाचा सोहळा । यावें भूपाळा पहावया ॥४४॥ श्रीरामाच्या निजजननी । आणाव्या सुखासनीं । भरत शत्रुघ्न पैं दोन्ही । गजारोहिणीं आणावे ॥४५॥ सेवक सुहृद लहानथोर । सेनापति

---

शब्दार्थ - १. आमंत्रण आल्याची सूचना, २. काळाची, ३. विश्वामित्राने, ४. धान्याची पेवे, ५. एक वार.

सहपरिवार । सोयरे आणावे समग्र । सोहळा स्वयंवर पहावया ॥४६॥ देखोनि जनकाचें मूळपत्र । दशरथासी आल्हाद थोर । प्रधान प्रेरिला सत्वर । रथ कुंजर शृंगारावया ॥४७॥ धन्य सद्‌गुरु विश्वामित्र । धनुर्विद्या अति विचित्र । त्याचेनि प्रतापें रघुवीर । कृतोपकार आम्ही केलों ॥४८॥ ताटिका वधिली अति दुस्तर । यागीं मारिलें राक्षस घोर । चापभंगें सीता सुंदर । वरी रामचंद्र गुरुविद्या ॥४९॥ यापरी प्रतापी रघुनाथा । विश्वामित्रें सुविद्यता । ऋषीची आज्ञा यावें लग्नार्था । आम्हां सर्वथा तेथें जाणें ॥५०॥

ततो राज्यां व्यतीतीयां सोपाध्याय: सबांधव: । राजा दशरथो हृष्ट: सुमंत्रमिदमब्रवीत् ॥३॥
अद्य सर्वे धनाध्यक्षा धनमादाय पुष्कलम् । व्रजंत्वग्रे सुविहिता नानारत्नसमन्विता: ॥४॥

दशरथाची मिथिला नगरीस जाण्याची तयारी : रायें नगरीं क्रमोनि[1] निशी । सांगे सुमंत प्रधानासी । श्रीरामसीतेच्या लग्नासी । जाणें मिथिलेसी अति शीघ्र ॥५१॥ भांडारें उघडावीं उठाउठीं । काढाव्या द्रव्याच्या कोट्यनुकोटी । भरावें गजवाजींच्या[2] पृष्ठीं । उरलें शकटीं[3] भरावें ॥५२॥ मुकुट कुंडलें अलंकार। रत्न मुक्ताफळें संभार । सूत्र पटसूत्र रोमसूत्र । वस्त्रें विचित्र सर्वे घ्यावीं ॥५३॥ राजपत्न्या अति सुकुमार। सुखासिनीं सालंकार । वस्त्रें गजर पालवछत्रें । अति शीघ्र चालों देईं ॥५४॥ रायासी आल्हाद फार । भरत शत्रुघ्न निजकुमर । सालंकृत मनोहर । रथीं सत्वर बैसविले ॥५५॥ सेनापति वीरें वीर । शृंगारिले सैन्यसंभार । टकेपताकानिजगजर । रथ कुंजर घडघडिले ॥५६॥ सेना चालिली एकसरें । वाजती नानापरींची तुरें[4] । गज गर्जती गहिरे[5] । भाट गजरें गर्जती ॥५७॥ वीरीं दिधली आरोळी । सिंहनादें पिटिली टाळी । पर्णावया जनकबाळी । राजकुळी चालिली ॥५८॥ आणोनि उत्तम रथांसी । रथीं बैसविले महाऋषी । वसिष्ठ वामदेव कश्यपासी । मार्कंडेय ऋषि जाबाली ॥५९॥ कात्यायनादि ऋषीश्वर । रायापासीं जे निरंतर । रथीं बैसविलें अपार । ज्ञानगंभीर निजनिष्ठा ॥६०॥ ज्यांच्या वचनाचेनि पडिपाडें[6] । कळिकाळ तोही पायां पडे । ऐसे ऋषिवर्य निधडे । रामवऱ्हाडा तेही आले ॥६१॥ ऐसे दोहीं भागीं ऋषीश्वर । मध्ये राजा सहितकुमर । पृष्ठगाभीं सैन्यसंभार । आले सत्वर मिथिलेसी ॥६२॥ नामकीर्ति विरक्ती भक्ती । इहीं तीन पेणां वस्ती । चौथेंपेणें रघुपती । निजात्मप्रीतीं भेटले ॥६३॥ अहंसोहकोहंगती । त्याचि तिहीं पेणां तीन वस्ती । तेथवरी ज्याची स्थिती । त्यासी राम निश्चिती भेटेल ॥६४॥ दृष्य द्रष्टा दर्शनस्थिती । या तिहीं पेणां तीन वस्ती । तीन्ही क्रमोनियां चौथी । राम निश्चितीं भेटेल ॥६५॥ विदेहनगरीं विदेहगती । राम राहिलासे सहजस्थितीं । तेथवरी ज्याची वस्ती । राम निश्चितीं भेटेल ॥६६॥ विदेह[7] श्रीराम भेटेल सत्वर । साधनचतुष्टय[8] शृंगार । चारी पुरुषार्थ[9] अलंकार । निधडे वीर लेइले ॥६७॥ यापरी पेणोपेणीं सत्वर । ठाकिलें[10] विदेहाचे नगर । अति सत्वर मनोहर । नगरी सुंदर शोभत ॥६८॥ मुळींचें पदीं वस्ती चाऱ्ही । करोनि पावले विदेहपुरी । तेंचि म्यां वर्णिलें ग्रंथाधारीं । श्रोतीं कुसरी[11] न करावी ॥६९॥ दशरथा जनकासीं भेटी । जानकी कन्या ज्याची गोमटी । दोघांचे भेटीची गोड गोष्टी । सुखसंतुष्टी आल्हाद ॥७०॥ रामायणाचें निजसार । तें हे सीतास्वयंवर । प्रकृति पुरुषां एकाकार । होती साचार सुलग्नीं ॥७१॥ जयाचेनि पावन पृथ्वी नवखंड । जयाचेनि पावन पिंडब्रह्मांड । त्याचिया लग्नाचें पैं कोड[12] । कथा अति गोड निरूपणीं ॥७२॥ एकाजनार्दना शरण । प्रकृतिपुरुषा पाणिग्रहण । श्रीरामसीतेचें लग्न । समाधान

---

**शब्दार्थ** – वसिष्ठांच्या तप:सामर्थ्यासंबंधीची पुराणातील कथा आहे – एकदा सूर्याच्या जागी वसिष्ठांनी स्वत:ची छाटी ठेवून तिच्याकडून उदय व अस्त ही सूर्याची कामे करवून घेतली.

१. घालवून, २. हत्तीघोड्यांच्या, ३. गाड्यांत, ४. मंगलवाद्ये, ५. भारदस्त आकर्षक, ६. थोरपणाने, ७. जनक, ८. वस्तुविवेक, वैराग्य, शमादि (शम, दम, दया, तितिक्षा, उपरती आणि समाधान) व मुमुक्षुत्व हे साधनचतुष्टय, ९. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ, १०. गाठले, ११. तिरस्कार, उपहास, १२. कौतुक.

जीवशिवां ॥७३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां दशरथागमनं नाम एकविंशतितमोऽध्यायः ॥२१॥ ओंव्या ॥७३॥ श्लोक ॥४॥ एवं ॥७७॥

# अध्याय बाविसावा

## सूर्यवंशवर्णन

दशरथ राजा मिथिलेला येतो : श्रीसदगुरूरामचंद्राय नमः । जीवशिवांचे समाधान । ते हे कथा रामायण । पवित्र परिकर[1] पावन । जगदुद्धरण जडजीवां ॥१॥ श्रीरामीं संलग्नता । सर्वांगें समरसें सीता । याचि नांव सुलग्नता । ते लग्नकथा अवधारा ॥२॥ मार्गीं वसोनि चारी वस्ती । राजा दशरथ शीघ्रगतीं । आला विदेहपुराप्रती[2] । जेथें रघुपति निजविजयी ॥३॥ विदेहपुरा वस्ती आले । ते त्रिभुवनीं विजयी जाले । विश्वमित्रें मित्रत्व केलें । गुरुत्व दिधलें वसिष्ठें ॥४॥ श्रीवसिष्ठें विश्वामित्रु । केला श्रीरामीं धनुर्विद्यागुरु । आपण ब्रह्मविद्यासद्गुरु । विजयी रामचंद्र यांचेनि ॥५॥ वसिष्ठनिष्ठानिजनिर्धारीं । दशरथ पावला विदेहपुरी । रत्नकळसांचिया हारी । तेजें अंबरीं रवि लोपे ॥६॥ दशरथ आला निजनगरीं । छत्रें पल्लवछत्रें वरी । निशाणें त्राहाटिल्या भेरी । मंगळतुरीं गर्जत ॥७॥

जनकाने सामोरे जाऊन सर्वांचे स्वागत केले : आलो ऐकोनि दशरथ । जनक सामोरा धांवत । शतानंद पुरोहित । सवें समस्त प्रधान ॥८॥ पुढें वसिष्ठ देखिला दृष्टीं । धांवोनि चरणीं घातली मिठी । जगदुद्धार स्वचरणांगुष्ठीं । सभाग्य सृष्टीं मी एक ॥९॥ वसिष्ठचरण जाले प्राप्त। आजि माझें कुळ पुनीत । आजि माझे पितर तृप्त । वंश सनाथ आजि माझा ॥१०॥ वसिष्ठ भेटल्या अभीष्ट[3] । वसिष्ठ भेटल्या अनिष्ट इष्ट । वसिष्ठ भेटल्या भाग्य वरिष्ठ । वसिष्ठें श्रेष्ठ निजदास ॥११॥ वसिष्ठ अत्यंत सज्ञान । जनक सद्भाव संपूर्ण । देखोनि दिधलें आलिंगन । समाधान दोघांसी ॥१२॥ दोनी दीप एक होती । द्वैतलोपें एकचि दीप्ती । तैसें आलिंगन देती । अभेदवृत्तीं आल्हाद ॥१३॥ वसिष्ठ देहींच विदेही । जनक सहजची विदेही । दोघे निःसंदेह विदेही । दिधलें पाहीं आलिंगन ॥१४॥ जनकवसिष्ठांचे भेटी । आल्हाद न माये सृष्टी । पुढें दशरथ देखिला दृष्टीं । उठाउठीं आलिंगी ॥१५॥ जानकीजनका श्रीराम जनका । आलिंगन पडलें देखा । तेणें संतोष सकळिकां । तिही लोकां आल्हाद ॥१६॥ एक जनक एक दशरथ । समर्थु आलिंगी समर्थ । तेणें सुखावे रघुनाथ । पुरला मनोरथ सीतेचा ॥१७॥ दोघां अति प्रीतीं आलिंगन । दोघे राजे सुखसंपन्न । सीतारघुनाथांचें लग्न । वेगीं सुलग्न करावें ॥१८॥ देखोनि भरत आणि शत्रुघ्न । राज प्रधान विस्मयापन्न । विस्मित मिथिलेचे जन । रामलक्ष्मण केंवि आले ॥१९॥ कांही जाला अपमान । किंवा चुकलें विधिविधान । दोघे आले हे रुसोन । अति उद्विग्न विदेही ॥२०॥ पुसोनि येतां कौशिकासी । दोघे होते गुरुसेवेसी। तेचि दोघे दशरथापासीं । शीघ्रवेगेंसी कां आले ॥२१॥ जनक वसिष्ठासी पुसे आपण । रामलक्ष्मण दोघे जण । येथें कां आले रुसोन । कोण विधान मी चुकलों ॥२२॥

दशरथपुत्रांचे वसिष्ठांकडून वर्णन : विदेहासी सांगे वसिष्ठ । रामलक्ष्मण ते ज्येष्ठ । भरतशत्रुघ्न हे कनिष्ठ । सांगतां स्पष्ट कळेना ॥२३॥ रूपरेखा समसमान । ठाणमाण गुण लावण्य । हे दोघे रामलक्ष्मण । भरतशत्रुघ्न ते कवण ॥२४॥ ऐसें बोलतां विदेहासी । हांसे आलें वसिष्ठासी । मग बैसवोनि सावकाशीं । पूर्ववृत्तांतासी सांगत ॥२५॥ भरत रामपिंडाचा अर्धभाग । तो रामरूपी दिसे सांग । शत्रुघ्न सौमित्राचा भाग । त्याचें सर्वांग तद्रूप ॥२६॥ हे चतुर्विध चारी मूर्ती । एकरूपें चतुर्धा[4] भासती । ऐसें ऐकोनि भूपती । विस्मयें चित्तीं तटस्थ ॥२७॥

शब्दार्थ - १. सुंदर, २. मिथिला नगरीला, ३. अत्यंत इष्ट, कल्याण, ४ चार प्रकारचे.

तेचि समयीं विश्वामित्र । घेवोनि आला रामसौमित्र । दशरथाचे चारी पुत्र । शोभा विचित्र एकत्वें ॥२८॥ देखतां चतुर्मूर्ति चतुर्रक[१] । पाहणे पाहतां अवघे एक । ऐकोनि जनका परम सुख । परम पुरुष हे चारी ॥२९॥

दशरथपुत्रांच्या लग्नाची जनकाकडून सूचना : कुशध्वज माझा कनिष्ठ बंधु । त्याच्या कन्या स्वरूपसिंधू । भरतशत्रुघ्नां करूं वधू । उर्मिलासंबंधू लक्ष्मणासी ॥३०॥ ऐसा जनकाचा मनोरथ । चवघां बंधूंसहित । जामाता जोडला रघुनाथ । उल्लासत स्वानंदें ॥३१॥

विश्वामित्रांची दशरथाकडून स्तुती : घेवोनी श्रीरामलक्ष्मण । विश्वामित्र आला आपण । दशरथ घाली लोटांगण । हर्षे चरण वंदिले ॥३२॥ आनंदें दशरथ बोलत । तुझी धनुर्विद्या समर्थ । तुझेनि विजयी श्रीरघुनाथ । कीर्ति विख्यात तुझेनि ॥३३॥ तुझेनि ताटिकेसी अंत । तुझेनि सुबाहूसी घात । तुझिये कृपें जानकी प्राप्त । तूं अति समर्थ ऋषिवर्या ॥३४॥ माझे अत्यंत कृपणपण । नेदीं म्हणे रामलक्ष्मण । ते त्वां आणोनि आपण । यशभूषण आपण दिधलें ॥३५॥ तुझेनि निजशिष्यपणें । तिहीं लोकीं मिरवे लेणें । ऐसीं लेवविलीं भूषणें । कंठाभरणें शिवासी ॥३६॥

विश्वामित्रांचे उत्तर : ऐसें ऐकतां स्तुतिस्तोत्र । हांसोनि बोले विश्वामित्र । रामचंद्रें मी पवित्र । ब्रह्मीं ब्रह्मसूत्र श्रीराम ॥३७॥ श्रीरामाचेनि शिष्यपणें । तिहीं लोकीं माझें गुरुत्व वंदणें । श्रीरामें माझें सनाथ[२] जिणें । जिणें मरणें मज नाहीं ॥३८॥ पूर्वी यागीं मी अनाथ । तो श्रीरामें केलों सनाथ । कर्माकर्मा करोनि घात । श्रीरघुनाथ तुष्टला ॥३९॥ श्रीरामशिष्यत्वाची नवाई[३] । मज देहवंता वंदी विदेही । रामकीर्ति सांगों काई । पाषाण पायीं पुनीत ॥४०॥ ज्याचेनि पायें तरती पाषाण । त्याचेनि गुरुत्वें मी धन्य । माझेंही यज्ञाचें फळ जाण । ब्रह्म परिपूर्ण श्रीराम ॥४१॥ ऐसें बोलतां विश्वामित्र । सुर सिद्ध करिती जयजयकार । वर्षती सुमनांचे संभार । प्रेमें विश्वामित्र मूर्च्छित ॥४२॥ वसिष्ठ येवोनियां तेथ । विश्वामित्रा करी सावचित । जें बोलिलासी तें इत्थंभूत । श्रीरघुनाथ परब्रह्म ॥४३॥ आल्हादें दशरथ उठोन । आलिंगी श्रीराम-लक्ष्मण । रत्नें धन्य धान्य ओंवाळून । चौघेही जण बैसविले ॥४४॥ वसिष्ठविश्वामित्रवचन । श्रीराम ब्रह्म परिपूर्ण । तेणे जनकासी आल्हाद पूर्ण । करावया लग्न उद्यत[४] ॥४५॥

दशरथाच्या चारही मुलांच्या विवाहनिश्चितीसाठी कुशध्वजाला निमंत्रण : शतानंद पुरोहितासी । शीघ्र त्यासी आणावें ॥४६॥ जनक धाडी कुशध्वजापासीं । तो धाकटा बंधु आम्हांसी । शीघ्र त्यासी आणावें ॥४६॥ त्यांसी संकाशा नाम नगरीसीं । म्यां राज्यीं स्थापिलें प्रतिष्ठेसीं । दोघी कन्या आहेत त्यासी । लावण्यराशी सुंदरा ॥४७॥ श्लाघ्य संबंधु रघुनंदना । दोघी द्याव्या भरतशत्रुघ्नां । यालागीं त्यासी शीघ्र आणा । लग्नीं सुलग्ना साधावया ॥४८॥ ऐकोनि जनकाचें[५] आकारण । शीघ्र कुशध्वज आला आपण । रायासी करोनि नमन । आलिंगन दिधलें ॥४९॥ जनकसभा सावकाशीं । मूळ धाडिलें दशरथासी । वेगीं बोलवूनी त्यासी । लग्नदिवसासी नेमावया ॥५०॥ दशरथ आला ऋषिमुळी । वसिष्ठ वामदेव रायाजवळी । कश्यप कात्यासन जाबाली । तपोबळी मार्कंडेया ॥५१॥ आले सखे सहज्जन । जनकें दिधला सन्मान । अवघे बैसविले सावधान । लग्नदिन नेमावया ॥५२॥ विवाह करावया सत्कुळीं । दोहीं वंशांची वंशावळी । शोधोनि पहावी समूळीं । ऋषि सकळी नेमिले ॥५३॥ वराचें कुळ समस्त । सांगावया वसिष्ठ कुळदैवत । तेणें सांगावा आद्यंत । इत्थंभूत रविवंश ॥५४॥

वसिष्ठकृत सूर्यवंशवर्णन : ऐकोनि ऋषींचें उत्तर । वसिष्ठें केला नमस्कार । ऐका सूर्यवंशविस्तार ।

शब्दार्थ - १. चार सूर्य, २. सुफलित, ३. यशस्वी, ४. उद्युक्त, तयार, ५. बोलावणे.

अति पवित्र भूपती ॥५५॥ सूर्यवंशाचिये ख्याती । महापातकी मुक्त होती । एक एक चक्रवर्ती। त्रिजगतीं भूषण ॥५६॥ सूर्याचा मुख्य मनु पुत्र । मनूचा इक्ष्वाकु पवित्र । तेणें अयोध्या मुक्तक्षेत्र । केलें नगर निजवासा ॥५७॥ यालागीं सूर्यवंशी जाण । म्हणती इक्ष्वाकुनंदन । म्हणावया हेंचि कारण । पदव्याख्यान याचि स्थितीं ॥५८॥ येच वंशी पृथु चक्रवर्ती । रसातळा जातां क्षिती । पृथूनें धरिली आत्मशक्तीं । पृथ्वी म्हणती त्याचेनि ॥५९॥ तेणें केलें पृथ्वीचें दोहन । सुखी केले सकळ जन । पूजाभक्तीनें पावन पूर्ण । अनर्घ्य रत्न सूर्यवंशीं ॥६०॥ येच वंशीं उत्तानचरण[1] । त्याचा पुत्र ध्रुव जाण । बाळपणीं देव सुप्रसन्न । करोनि आपण अढळ जाला ॥६१॥ योनिद्वारें न जन्मतां । पित्याचे कुशीं जन्म पावतां । परी मरों नेदीच निजधाता[2] । तो मांधाता रविवंशीं ॥६२॥ शिबी चक्रवर्ती येच वंशी । पक्ष्यासाठीं तुकी[3] मांसासी । नगरी नेली वैकुंठासी । सत्वराशि शिबी देखा ॥६३॥ सूर्यवंशीं अति पवित्र । जन्म पावला हरिश्चंद्र । स्वप्नदानविधिउपचार । केला साचार जागृतीं ॥६४॥ दक्षिणा द्यावया समग्र । डोंबाघरीं होय परतंत्र । विकोनियां स्त्रीपुत्र । विश्वामित्र सुखी केला ॥६५॥ रुक्मांगद येच वंशीं । व्रत पाळोनि एकादशी । नगरी नेली वैकुंठासी । व्रतें जगासी उद्धार ॥६६॥ सुरासुरां नागवे वैरी । धूमांकित पाताळविवरीं । त्यातें शोधोनियां मारी । तो धुंधुमार रविवंशीं ॥६७॥ त्याचा पुत्र धर्मांगद । एकादशीव्रतीं आल्हाद । शिर देतां न मानी खेद । परमानंद पावला ॥६८॥ सूर्यवंशींचे भूपती। एका चढी एकाची ख्याती । श्रवणें जन पावन होती । वंशात्पत्ती अवधारा ॥६९॥ येच वंशी अंबऋषी । व्रत साधोनि द्वादशी । देव आणिला गर्भवासासी । दुर्वासासी वांचविलें ॥७०॥ येव वंशीं राजे सगर । ज्यांचेनि नांवें जाले सागर । कपिलशापें जळतां शूर । करी उद्धार भगीरथ ॥७१॥ भगीरथें निजात्मशक्तीं । आणोनियां भागीरथी । पूर्वज तारिले नेणों किती । त्रिजगतीं उद्धार ॥७२॥ भगीरथसुत प्रवीण युद्धीं । देवां दैत्यां युद्धसंधीं । इंद्रें बैसवोनियां खांदीं । नेला त्रिशुद्धी युद्धासी ॥७३॥ बैसला इंद्राच्या ककुदीं । यालागीं काकुत्स्थ[4] म्हणती । त्यांच्या नामाची निजख्याती । काकुत्स्थ म्हणती श्रीरामा ॥७४॥ रविवंशीं अति निष्पाप । राजा जन्मला दिलीप । कामधेनु उपासी नृप । अति साक्षेपें[5] पुत्रार्थी ॥७५॥ कामधेनु प्रसन्न पूर्ण । रघु पुत्र पावला सुलक्षण । ज्याचेनि नांवें रघुनंदन । वंशींचा जाण म्हणताती ॥७६॥ रघूचा अज अतुर्बळी[6]। अति प्रतापी भूमंडळीं । वैरी अजप्राय[7] बळी । पायांतळी मेमाती ॥७७॥ त्या अजाचा दशरथ । शुक्र जिंकिला युद्धात । स्वर्गीं जाला यशवंत । सन्मानिला अमरेंद्रें ॥७८॥ पराभविलें दैत्यगुरूसी[8] । अति आल्हाद बृहस्पतीसी । आलिंगूनियां हृदयेंसीं। निजनगरासी धाडिला ॥७९॥ त्याचे पुत्र चौघे जण । श्रीराम आणि लक्ष्मण । धाकुटे भरत शत्रुघ्न । आदिकारण हे चारी ॥८०॥ केला ताटिकेचा निर्वाळा[9]। सुबाहु मारिला राक्षसमेळां । रावण अपमानिला बळा । चरणीं शिळा उद्धरिली ॥८१॥ सूर्यवंशींचें वर्णन । वसिष्ठ गर्जे आल्हादोन । सुमनें वर्षती सुरगण । हर्षत मन जनकाचें ॥८२॥ ऐकोनि सूर्यवंशावळी। महासिद्धीं पिटिली टाळी । धन्य धन्य जनकबाळी । भाग्यें तत्कुळीं सुलग्न ॥८३॥ परिसोनि निजवंशवर्णन । दशरथासी आल्हाद पूर्ण । वसिष्ठावरी ओंवाळून । देत गोदान लक्षकोटी ॥८४॥ मग उठोनि महाऋषीं । बैसविलें वसिष्ठासी । तूं सूर्यवंशाचा सद्गुरू होसी । रविवंशासी भूषण ॥८५॥ सूर्यवंशीं जे जे भूप । सांगितले अतिप्रताप । ते तुझेनि निष्पाप । तूं सद्रूप सद्गुरू ॥८६॥ जेवीं सूर्य निजतेजेंसीं । सूर्यकांतीं तेज प्रकाशी । तेंवी तुझेनि अनुग्रहेंसीं । सूर्यवंशासी प्रताप ॥८७॥ अचेतन तुझिया कृपादृष्टी[10] । सूर्यमंडळीं तपे छाटी। तुझा अनुग्रह

---

शब्दार्थ - १. उत्तानपाद, २. आपला उत्पन्नकर्ता, ३. तोली, वजन करी, ४. वशिण्डावर, ५. तत्परतेने, ६. मोठा पराक्रमी, ७. बोकडाप्रमाणे बेंबें करून ओरडतात, ८. शुक्राचार्याला, ९. नाश, १०. कृपेने.

जाल्यापाठीं । शिष्य सृष्टीं निजविजयी ॥८८॥ वसिष्ठ वक्ता सुखस्वानंद । सभेसी जाला परमानंद । जनक भाग्याचा अगाध । लग्नसंबंध श्रीरामीं ॥८९॥ एकाजनार्दना शरण । जालें सूर्यवंशव्याख्यान । जनकवंशांचें निरूपण । सावधान अवधारा ॥९०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां सूर्यवंशनिरूपणं नाम द्वाविंशतितमोऽध्याय: ॥२२॥ ओंव्या ॥९०॥

## अध्याय तेविसावा

### सीमान्तपूजन-भोजनसमारंभ

श्रीसद्गुरूरामचंद्राय नम: ॥ सूर्यवंशींचे भूपती । असंख्य आणि अगाधकीर्ती । मे म्यां सांगितले संकळितीं[1] । क्षमा श्रोती करावी ॥१॥

एवमुक्तोऽथ जनकस्तमुवाच कृतांजलि: । श्रोतुमर्हसि धर्मज्ञ मत्कुलं शृण्वतां वर ॥१॥
प्रधानेश्वर वक्तव्यं कुलं निरवशेषत: । वक्तव्यं कुलजातेन तन्निबोध नरेश्वर ॥२॥

वसिष्ठें सूर्यवंशावळी । वर्णिली अति प्रांजळी[2] । जनक उठोन तये वेळीं । कृतांजळी[3] विनवीत ॥२॥

**जनकाचें कुलवर्णन :** माझिये कुळींचे भूपाळ । ख्यातिवंत अति प्रबळ । राउळें[4] परिसावे सकळ । सकळकुळपर्यावो[5] ॥३॥ कन्यादानीं सकळ कुळ । सांगावें लागे स्वयें समूळ । पहिले कुळीं निमी भूपाळ । त्याची कीर्ति प्रबळ तिहीं लोकीं ॥४॥ वसिष्ठाचे शापस्थितीं । जगाचें देखणें ज्याची वस्ती । ज्याचेनि डोळे देखणे होती । यालागीं म्हणती निमी त्यातें ॥५॥ निमिषानिमिषाची गती । ज्याचेनि चाले अहोरातीं[6] । यालागी त्यातें निमी म्हणती । जाण निश्चितीं नरनाथा ॥६॥ निमिचा सुत मिथी सोज्ज्वळा । नगरी वसविली स्वलीळा । यालागीं ईतें म्हणती मिथिला । स्वनामें सोहळा निजनगरीं ॥७॥ मिथिपुत्र प्रथम जनक । जो कां अत्यंत सात्विक । पुत्रप्राय पाळिले लोक । यालागीं नांव जनक त्यासी ॥८॥ त्याचा पुत्र धृष्टकेतु । जनकवंशीं अति विख्यातु । दळें बळें प्रतापवंतु । धर्मसेते निजधर्मा ॥९॥ त्यापासोनि अनेक । जनक नामाचे तृप देख । ते सांगतां असती असंख्य । कथा आत्यंतिक वाढेल ॥१०॥ बहुलाश्वजनक स्वकीर्तिजनक । स्वदेहजनक विदेहजनक । त्यांमाजि मीही एक जनक । निजसेवक तुमचा ॥११॥ वंशावळी वाढवितां । अपार वाढेल ही कथा । लग्नीं साधावें रघुनाथा । हे परमावस्था[7] जनकासी ॥१२॥ घ्यावया आमुच्या निजराज्यासी । हिरोन न्यावया सीतेसी । सुधन्वा आला अति क्रोधेसीं । तेणें मिथिळेसी वेढिलें ॥१३॥ मग मी युद्ध केलें त्यासीं । रणीं वधिलें सुधन्व्यासी । मग त्याचिया राज्यासीं । कुशध्वजासी म्यां स्थापिलें ॥१४॥ कुशध्वज माझा धाकटा बंधू । राजाप्रतापें प्रतापसिंधू । त्याच्या कन्या दोघी वधू । वरसंबंधू करूं इच्छीं ॥१५॥

**दशरथाच्या चार पुत्रांना आपल्या चार कन्या देण्याचा संकल्प :** सीता दिधली श्रीरामासी । ऊर्मिला दिधली लक्ष्मणासी । मांडवी दिधली भरतासी । शत्रुघ्नासी श्रुतकीर्ती ॥१६॥ चौघे बंधू चारी वधू । ऋषी म्हणती श्लाघ्य[8] संबंधू । अवघीं केला निश्चयशब्दू लग्नविधि अवधारा ॥१७॥

**कुलगुरू व विश्वामित्रांचे अनुमोदन, दशरथाची संमती :** वसिष्ठ विश्वामित्र वामदेव । अवघे म्हणती अति अपूर्व । श्लाघ्यसंबंधगौरव । भाववैभव समसाम्य ॥१८॥ आजिचे तिसरे दिवशीं । उत्तराफाल्गुनी सुदिनेंसीं । अभिजित साधून मध्यान्हेंसीं । लग्न चौघांसीं लावावें ॥१९॥ वसिष्ठविश्वामित्राचे वचन । दशरथें मस्तकीं वंदून । तुमचें वाक्य परम प्रमाण । करणें

शब्दार्थ - १. संक्षेपाने, २. स्पष्ट, ३. हात जोडून, ४. राजाने, ५. सर्व कुलाचा विस्तार, ६. रात्रंदिवस, ७. अत्यंत उत्कंठा, ८. स्तुत्य, उत्तम.

लग्न चौघांचे ॥२०॥ जनक कुशध्वज नृपती । दोघेही व्याही परमार्थी । विजयी जाला रघुपती । ते अति कीर्ति तुमचेनि ॥२१॥ लग्न करणें हे प्रमाण । भेरी त्राहाटिलें निशाण । दोहीं रायां हर्श पूर्ण । सुहृज्जन आल्हादी ॥२२॥

देवकस्थापना : दशरथें पुसोनि जनकासी । सवें घेवोनि महाऋषी । वेगें आला जानवशासी । देवकासी आरंभ ॥२३॥ जनक बोळवीत ये सर्वांसी । हात जोडोनि ऋषिरायांसी । शिष्य सेवक मी तुम्हांसी । बांधवांसीं ससैन्य ॥२४॥ श्रीरामलग्नाचा महोत्साहदोहीं मांडवीं उत्साह । मिनला ऋषिसमुदाव । नवल नवलाव लग्नाचा ॥२५॥

लग्नमंडपाचे वर्णन : रामविवाहा मंडपस्तंभ । चारी वेद जाले स्वयंभ[1] । आडवळे धैर्याचे सलंब[2] । वांसे निकोंभ विवेकाचे ॥२६॥ त्यावरी शाकार स्मृतिपुराणें । चारी पुरुषार्थ तोरणें । धर्मद्वारें शोभती तेणें । सलंबपणें मुक्तघोंसीं ॥२७॥ धर्मद्वार नित्यमुक्त । द्वारनिरोध[3] नाहीं तेथ। दीनें वरापासीं पावत । सुखी होत तत्काळें ॥२८॥ वसिष्ठ पुरोहित सुबुद्धी । मंडप कापडिला उपनिषदीं । शोभा शोभे त्रिशुद्धी । चिदानंदी मंडप ॥२९॥ मंडपशोभा शोभे कैसी। पताका शोभती चिदाकाशीं । देखतां सुख होय दृष्टीसी । मंडपवासियां आल्हाद ॥३०॥ कन्यामंडपीं स्तंभ भावाचे । आडवळे शुद्धसत्वाचे । वरी शाकार विधीचे । सद्बुद्धीचे दारवंटे ॥३१॥ कन्यामंडपीं चांदवा धर्म । वरमंडपीं वितान[4] ब्रह्म । कन्यागृहीं दाटुगें कर्म । कर्म निष्कर्म वरगृहीं ॥३२॥ कन्यागृहीं साधन पंक्तीं । वरगृहीं साधन शांती । कन्यागृहीं रत्नज्योती[5] । निजदीप्ती वरगृहीं ॥३३॥ कन्यागृहीं नवरसप्रीती । वरगृहीं नवविधा भक्ती । कन्यागृहीं विधि सर्वार्थी । विधिनिर्मुक्ति वरगृहीं ॥३४॥ कन्यागृहीं नृत्यचाचरी । वरगृहीं कीर्तनगजरी । कन्यागृहीं भाट कैवारी । वेदनागरी वरगृहीं ॥३५॥ कन्यामंडपीं नोवऱ्या चारी । वरमंडपीं मिथ्या नरनारी । दोहीं मंडपांमाझारी । अगाध थोरी सामर्थ्य ॥३६॥ वसिष्ठें दशरथासी बैसवोन । देवकविधि पुण्याहवाचन । नांदीश्राद्ध करवोन । बहु हरिण्य वांटिले ॥३७॥

स गत्वा निलयं राजा श्राद्धं कृत्वा च पुष्कलम् । पुत्रार्थी प्रियपुत्रस्थ चक्रे गोदानमुत्तमम् ॥३॥
गवां शतसहस्राणि विधास्य इति चाब्रवीत् । आपृच्छऽ जनकं राजा पुत्रानुद्दिश्प धार्मिकः ॥४॥
सुवर्णशृंगीः सुच्छन्नाः सवत्साः कांस्यदोहनाः । वित्तमन्यद्‌बहुवलु द्विजेभ्यों रघुनंदनः ॥५॥

मंडपसंरक्षणासाठी देवता-क्षेत्रपालांचे आगमन : श्रीवसिष्ठें आव्हानितां । नलिनी नंदिनी उमादि समस्ता । मंडपीं समस्त मंडपदेवता । मूर्तिमंता पैं आल्या ॥३८॥ नवग्रहादि[6] ग्रह समस्त । मंडळें सोडोनियां त्वरित । अवघे आले मंडपांत । श्रीरघुनाथलग्नार्थी ॥३९॥ मंडपदेवता ग्रहपरवडी[6] । श्रीरामा वंदिती आवडीं । आमुची तोडील हा बेडी । सोडवील बांधवडी लंकेची ॥४०॥ क्षेत्रपाळ अहोरातीं । मंडपद्वारीं नित्य जागती । रावणें हरिल्या क्षेत्रवृत्ती । त्या रघुपती सोडवील ॥४१॥ देवकप्रतिष्ठा ऐसिया रीतीं । श्रीवसिष्ठें विधानोक्तीं । करविली रायाहातीं । आल्हाद चित्तीं दशरथा ॥४२॥

दशरथहस्ते गोदाने : पाचारोनियां ब्राह्मण । शतानुशतें करी गोदान । श्रीरामें लक्षोनियां दान। दानविधान अवधारा ॥४३॥ नेदीच लातरिया[7] डिवरिया । नेदीच अत्यंत बुजरिया । चोरपान्हा खावरिया[8] । मरळा कुचरिया नेदीच ॥४४॥ ऐसिया गाई दान देतां । अवचटे घडे ब्रह्महत्या । दानीं दुभाळुवा अतिशांता । होय देता नृपनाथ ॥४५॥ नेदीच[9] फळवटा प्रथमविताच्या । नेदीच वृद्धा बहुवितांच्या । तरुण सुदोही सुस्तनांच्या[10] । बहुमोलाच्या उत्तमा ॥४६॥ सुवर्णश्रृंगी रौप्यखुरी । कांस्यदोही क्षौमांबरी[11] । रत्नपुच्छा सुकुमारी । सालंकारी शोभत ॥४७॥ जैशा

---

शब्दार्थ - १. स्वत:सिद्ध, २. लांब, ३. प्रतिबंध, मज्जाव, ४. छत, ५. द्रव्य, ६. निरनिराळे ग्रह, ७. लाथ मारणाऱ्या, ८. मारकुट्या, बुजऱ्या, पान्हा चोरणाऱ्या वगैरे, खोडकर, ९. रीतीने, १०. दुभत्या, दूध देणाऱ्या, ११. रेशमी वस्त्र पाठीवर ज्याच्या त्या.

गाई तैशीं आभरणें । तैसीच दक्षिणा संपूर्ण । पुत्रोद्वाहीं[1] देतसे दान । सुखी ब्राह्मण तेणें केले ॥४८॥ तिळपात्रें घृतपात्रें । क्षीरसहित भोजनपात्रें । द्विजांसी दिधलीं नृपवरें । श्रीरामचंद्रें उत्साहो ॥४९॥ श्रीरामभावना भावून । सकळ लोक करिती दान । प्रत्यक्ष श्रीरामें निजदान । भाग्यसंपन्न दशरथा ॥५०॥

भरताचा मामा युधाजित याचे आगमन : देवकप्रतिष्ठा अतिगजर । हर्षे दान दे नृपवर । तेचि समयीं युधाजित शूर । आला ज्येष्ठ सहोदर कैकयीचा ॥५१॥ तो भरताचा निजमातुळ । सुहृत्संबंधी अति कुशळ । स्वसापुत्र[2] स्नेहाळ । रायें तत्काळ आलिंगिला ॥५२॥ श्यालक[3] बोले दशरथासी । भेटावया दोहीं पुत्रांसी । प्रीति कैकयरायासी । मज तुम्हांपासी पाठविलें ॥५३॥ ममी जंव आलों अयोध्येसीं । तंव तुम्हीं आलेती लग्नासी । ऐकोनि लग्नोत्साहासी । अति त्वरेंसीं मी आलों ॥५४॥ अवधीं केलें अभ्युत्थान[4] । रायें दिधला अति सन्मान । दिधलें सुमनचंदन । वरासन बैसावया ॥५५॥ अभ्यंग करितां वरासी । मंगळतुरध्वनि आकाशीं । अलंकारीं दासदासी । महाऋषि पूजियेले ॥५६॥ वस्त्रें भूषणें विचित्रलीला । गंधाक्षता सुमनमाळा । देती परिमळतांबूला । दानलीला शोभत ॥५७॥

चार जावयांचा सत्कार : केळवला रघुनंदन । कोणी नाहीं हीन दीन । अवघेची दिसती प्रसन्नवदन । सुप्रसन्न दशरथ ॥५८॥ वस्त्रें अलंकार अति चोखट । सभा बैसली घनदाट । रायें रचिलें वैकुंठ । अति उद्भट निजशोभा ॥५९॥ श्रीरामाच्या निजतेजेंसी । शोभा आली मंडपासी । रमेहूनि वरिष्ठ दासी । श्रीरामापासीं शोभत ॥६०॥ हातीं धरोनि वसिष्ठा । रायें केली यागप्रतिष्ठा । होम दिधला हव्यवाटा[5] । ज्येष्ठश्रेष्ठां पूजिले ॥६१॥ जनकें अत्यंत गजरेंसी । आणिलें सीमांतपूजेसी । सभा शोभताहे कैसी । वैकुंठवासी नरनृप ॥६२॥ वैकुंठींचें निजसामर्थ्य । येथें आणिलें समस्त । जनक निजभाग्यें समर्थ । श्रीरघुनाथ जांवई ॥६३॥ चारी मुक्ती ते चवाई[6] । तीवरी बैसविला जांवाई । तेणेंचि सन्मानें तिघेही । ठायींच्या ठायीं बैसविले ॥६४॥ सत् चित् आनंद तिन्ही जाण । गुणातीत शोभायमान । तैसेचि हे तिघे जण । श्रीरामें पूर्ण शोभती ॥६५॥ मुकुट कुंडलें रत्नमेखळा । करीं मुद्रिका[7] रत्नमाळा । निजभावाचें पदक गळां । हृदयकमळावरी शोभे ॥६६॥ जानकीजनकें विदेहवीरें । आणिलीं शुद्ध चिदंबरें[8] । तीं वेष्टिलीं रामचंद्रें । अत्यादरेंकरूनियां ॥६७॥ येरही वर याचि रीतीं । गौरविले अति प्रीतीं । देखोनि विदेहनृपतीची भक्ती । श्रीरघुपति उल्हासे ॥६८॥

ऋषिपूजन, विश्वामित्रांना अग्रपूजेचा मान : वसिष्ठ म्हणे गा विदेहेंद्रा । आधीं पूजावें विश्वामित्रा । वचन मानलें राजेंद्रा । पूजी ऋषीश्वरा अग्रपूजा ॥६९॥ पूजिले वसिष्ठ वामदेव । कश्यपादि ऋषिसमुदाव । पूजिला मातुळ महाबाहो । पूजिला राव दशरथ ॥७०॥ आत्यंतश्रद्धा जानकीजनक । तेणें पूजिला श्रीरामजनक । सोयरे सुहृद एक एक । सेवकेंसेवक[9] बुझाविले[10] ॥७१॥ ऋष्यशृंगाची निजकांता । मुख्य करवली ते शांता । जनक पूजी दिव्यांबरता[11] । नानारत्नालंकारीं ॥७२॥ सुविद्या अविद्या श्रद्धा पत्नी । तैशा वरमाया तिघी जणी । सुमेधा लागली त्यांचे चरणीं । रत्नभूषणीं पूजियेल्या ॥७३॥ जनकाची स्त्री पतिव्रता । सुमेधा सीतेची निजमाता । भावे वंदिलें रघुनाथा । चरणीं माथा ठेविला ॥७४॥ वृद्धपरंपरा पूर्ण । वोहमाय[12] उटी वराचे चरण । शुद्धमेधेनें पैं आपण । श्रीरामचरण पूजियेले ॥७५॥

भोजनपंक्ती, पक्वान्नवर्णन : लाज सांडोनि रोकडी । सुमेधा विनवी अति आवडीं । माझी रुखवतपरवडी[13] । स्वामीनें गोडी चाखावी ॥७६॥ तुझेनि उद्देशें सतत । परिपाक केले बहुत । भावाचा भोक्ता रघुनाथ । मनोरथ पुरवावे ॥७७॥ तिचा जाणोनि मनोरथ । भावें तुष्टला

---

शब्दार्थ - १. मुलाच्या लग्नात, २. बहिणीचा मुलगा, ३. मेहुणा, ४. उभे राहणे, ५. अग्नीत, ६. चौरंग, ७. आंगठ्या, ८. चैतन्यरूपी, वस्त्रे, ९. एकंदर सेवक, १०. समजविले, सत्कारिले, ११. सुंदर वस्त्रे देऊन, १२. वधूमाता, १३. रुखवताचे उपहार.

रघुनाथ । जनकें प्रार्थिला दशरथ । भोजनार्थ रुखवतीं ॥७८॥ मध्ये श्रीराम केवळ । आवरणपंक्ती[१] राजे सकळ । स्वप्रकाशें दीप प्रबळ । भाग्य सुफळ सुमेधेचें ॥७९॥ चैतन्यतेजें अति चोखटें । समभावें सुवर्णताटें । पूर्णरसें भरिली वाटे । अपूर्ण कोठें असेना ॥८०॥ एकी शाखा ते खणिवा । एकी केवळ खुडिवा । एकी सदेंठी तोडिवा । एकी सुरेख सोलिवा सुवास ॥८१॥ एक कडुवटे खणुवाळी । एक तिखटे तोंडाळी । एक सलंब सरळी । एक वाटोळी गडबडिजे ॥८२॥ एक हिरवी कर्करिते । एक टणक जारसे कचकचितें । एक बहुबीजें बुजबुचिते । एक हसहसिते कोरडी ॥८३॥ एक अत्यंत आंबट । एक सबाह्य तिखट । एक सर्वांगे कडुवट । एक तुरट समसमिते ॥८४॥ एक वाटोळी जारठली । एक सपुष्ट सारठली । एक मुरडी मुरकुठली । एक तुटली अनुवाये ॥८५॥ ऐशा फळावळीफळभारें । केलें समरस सांबारें । अवघ्या वाघरी वोघारे । निज थावरे श्रीरामें ॥८६॥ ऐशा नाना परींच्या शाका । परवडी केली रघुनायका । एकचि स्वादें जेविती देखा । अति नेटका जेवणार ॥८७॥ एक परिपाकें उतटली । स्नेहदेंठींहून सुटली । वनिताहातून निसुटली । स्वादा आली शिखरणी ॥८८॥ झाडीं पिकलीं देंठकेणें । तरी आंबे आंबटपणें । सेजे मुराल्या एकांतपणें । न चाखतां घ्राणें चवी फावे ॥८९॥ रूपें दृष्टीतें बुझावी । वासें घ्राणातें समजावी । वाचा श्रवणातें बरा म्हणवी । स्पर्शे निववी त्वचेतें ॥९०॥ रसना सेवितां रसमात्र । गोडिया सुखावें अंतर । सेवितां रामचंद्रवीर । सबाह्याभ्यंतर सुखरूप ॥९१॥ एकलें एक चूतफळ[२] । निववी इंद्रियें सकळ । श्रीरामपंक्तीं अच्युतफळ । जग सकळ सुखरूप ॥९२॥ वैराग्यतापें तापलिया । त्याचि संतप्त काचरिया । अनु तापतैलीं तळलिया । चवी आलिया श्रीरामें ॥९३॥ एकें भोजनीं अविचारितें[३] । सेविती निंदेचे राइतें । चवी चाखतां कुसमुसितें[४] । कपाळ हातें पिटिती ॥९४॥ नाकीं तोंडी धूर उठी । तळमळूनि कपाळ पिटी । राम त्यातें नातळे दृष्टीं । हे परिपाटी[५] भोजनीं ॥९५॥ लोणचीं वाढिलीं अनेकें । रंगलीं भक्तिप्रेमरंगें । एकें सलवणें सर्वांगें । स्वाद श्रीरंगें सेववा ॥९६॥ अहं कडुवट कुहिरी । सोहं लोणच्यांत रंगली खारीं । वैराग्यभोकरें खारलीं सारीं । त्याहीमाझारी मुक्त मिरवे ॥९७॥ स्वबाध आलेंसीं आंवळा । भोजनें चवी अति आगळा । मुळींच्या मुळेंसीं रंगला । स्वयें सेविला श्रीरामें ॥९८॥ त्रिगुणाचें निजत्रिकूट निर्गुणें भरिलें त्याचें पोट । घमघमीत उद्भट । अति स्वादिष्ठ श्रीरामें ॥९९॥ ऐसीं लोणचीं नेणों किती । मुख्य स्मरण आले नेपतीं । तो स्वाद जाणे रघुपती । बैसले पांतीं[६] ते धन्य ॥१००॥ सूक्ष्म सेवेच्या सेवया । मोडोनि देतां सगळिया । क्षीरसाखरेशीं आळलिया । स्वयें सेविल्या श्रीरामें ॥१॥ पोकळ वळवटें सरळीं । एके वाटोळीं लांबोळीं । सेवेमाजी अवधीं आलीं । ठायीं पावलीं रघुनाथा ॥२॥ परम स्वादाची साखर । पंचरस पंचधार । घृत वाढिलें सर्वसार । स्वादें रामचंद्र डुल्लत ॥३॥ अनुतापें सद्यस्तप्त । निजसाराचें सार घृत । अखंडधारा स्वयें वाढित । श्रीरघुनाथ निजभोक्ता ॥४॥ शास्त्रपरिपाडें पापड । नानायुक्ती अति तडफड । जळजळेचे आले फोड । तेणें कडकड मोडती ॥५॥ यालागीं घातले होते मार्गे । ते ओढोनि भजनमार्गें । विरवोनियां सर्वांगें । रामभोगें स्वादिष्ठ ॥६॥ श्रीरामसीतेची प्रीती सदा । त्यामाजी सांड्या अबद्धा । यालागीं न करीच सुमेधा । वृद्धानुवादा जाणोनी ॥७॥ समूळ गुंतली कुरवंडी । स्वयें नुगवेचि बापुडी । शांतिदांती केली कुडकुडी । आली रोकडी रामसुखा ॥८॥ विषयलालसाचे पैं लाडू । विवेकें वाढिले फोडफोडूं । तेणें पडिपाडें तिळव्याचा जोडू । स्वाद गोडू श्रीरामें ॥९॥ वैराग्यकढें कढविली कढी । तीमाजी माया मुगवडी । विरोनि स्वादा आली गाढी । तिची गोडी राम जाणे ॥११०॥ त्यामाजीं जिरें मिरें कापुरा । तेणें सुवास चढे

---

शब्दार्थ - १. सभोवती पंक्तीने, २. आंबा, ३. मूर्खपणाने, ४. नाकात भरते, ५. क्रम, ६. पंक्तीला.

अंबरा । रसज्ञ सेविती फरफरा । श्रीरामचंद्राचेनि धर्मे ।।११।। भजनभावाच्या मांडेपुरिया । क्षीरसागरींच्या क्षीरधारिया । सबाह्य गोड गुळंवरिया । पूर्णपुरिया परिपूर्ण ।।१२।। भजनभेदें सफेद फेणी । प्रेमशर्करा भरली भरणी । अमृतफळातें लाजवोनी । वाढले आयिणी आंबवडे ।।१३।। नुसंधी गोडियेची घडियेली । तैसी खांडवी वाढिली । चंद्रबिंबींची काढिली । घडी मांडिली मांडियांची ।।१४।। मांडियांची ऐका नवलपरी । चतुर्वेद घडिया चारी । कर्म कानवले उत्तरी । श्रीरामचंद्रीं निजस्वाद ।।१५।। विवेकसडणीं अति सोज्ज्वळे । उभय भागीं निजतेजाळे। तांदूळ वेहियेले आणियाळे[1]। भावबळें अरुवार[2] ।।१६।। सोहं ओगराळें सनाथ । अलिप्तपणें भरिला भात । ठायीं वाढिल न फुटत । श्रीरघुनाथ निजभोक्ता ।।१७।। अन्ना वरान्नें[3] श्रेष्ठता । सबाह्य कोंडा सांडिला परता । चढलें मध्यनायकाचे माथां । प्रिय रघुनाथा यालागीं ।।१८।। सर्व स्वादाचें कारण । स्वयें श्रीराम आपण । यालागीं वाढिलें वरी लवण[4] । अपूर्ण तें पूर्ण करील ।।१९।। श्रीरामपंक्ती रस पीयूष[5] । ज्यासी श्रद्धेची अति भूक । ग्रासोग्रासीं चढतें सुख । हे परवडी देख त्यालागीं ।।१२०।। न्यून नाहीं श्रीरामपंक्तीं। जेवितां जेविते चवी जाणती। रुचलेपणें जाणे वाढती। जनक नृपति सावध ।।२१।। सुमेधा सदा सावधान । जाणे तृषिताचें लक्षण। सबाह्य निववीतसे पूर्ण। जीवा जीवन देतसे ।।२२।। सुमेधा स्वयें खुणावितीं। चारी मुक्ति स्वयें राबती । जें जें ज्याचे मनोगतीं । तें तें देती त्या ठायीं ।।२३।। पहिल्या नवजणी[6] वाढत्या । चवघी[7] जणी पूर्ण कर्त्या । जे पंक्तीस श्रीराम भोक्ता । तेथें अतृप्तता असेना ।।२४।। एवं तृप्त अभ्यंतर । देती स्वानंदउद्गार। स्वानंदे कोंदलें जेवणार । श्रीरामचंद्र निभोक्ता ।।२५।। सुमेधा सावधान वाढी । राजे धाले निजपरवडीं । ब्राह्मणतृप्ति जाली गाढी । धोत्रें बुडीं ढिलावती ।।२६।। तृप्ति जाली सकळिकां । उष्टावणी रघुकुळटिळका । रामनामी निजमुद्रिका । ठायीं देखा ठेविली ।।२७।। श्रीराम नाममुद्रा देखतां । उल्लास सुमेधेच्या चित्ता । चरणीं लागली रघुनाथा । लाज सर्वथा विसरली ।।२८।। संतोषोनि रघुपती । सुमनमाळा तिसी देती । हर्ष न समाये त्रिजगतीं । सीता सती सभाग्य ।।२९।।

तांबूलवर्णन व दान : जे जे जेविले श्रीरामपंक्तीं । ते ते संसारा आंचवती । श्रीरामनामें सुखीं रंगती । विडे शोभती सुरंग ।।१३०।। फोडफोडूनि फळाशा । शांतिपक्वपानाची दशा[8] । वासना शिरा काढोनि निःशेषा । तांबूल परेशा श्रीरामा ।।३१।। अहं जाळोनियां कठिणपणा । सोहं गाळींव काढिला शुद्ध चुना । लागोनि शांति परिपक्व पाना । श्रीरामवदना सुस्वाद ।।३२।। सर्वसाराचें निजसार । तोचि सेविती खदिरसार[9] । श्रीराममुखीं रंगाकार । अधरीं सधर शोभत ।।३३।। श्रीरामप्रसाद हाता येतां । सुमेधा लाहे उल्लासता । स्वयें सीतेचे हातीं देतां । तिनेंही माथां वंदिली ।।३४।। वंदूनियां श्रीरामचंद्रा । हृदयीं धरिली राममुद्रा । प्रसाद सेवितां ते भद्रा । नरा नरेंद्रा विपुलांगें ।।३५।। श्रीरामाच्या निजदीप्तीं । उदय अस्त नाठवती । उपाध्ये रायातें सांगती । उदया गभस्ति येऊं पाहे ।।३६।। मांडवा चाला लवडसवडीं । आधीं प्रतिष्ठाची घडी । दशरथें निजनिरवडीं । फळ तांतडीं आणावें ।।३७।। एकाजनार्दना शरण । जालें रुखवत संपूर्ण । पुढें सीतापाणिग्रहण । सावधान अवधारा ।।३८।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां सीमान्त पूजनरूखवतभोजनं नाम त्रयोविंशतितयोऽध्यायः ।।२३।। ओंव्या ।।१३८।। श्लोक ।।५।।

---

शब्दार्थ - १. टोकदार, २. नाजूक, ३. वरणाने, ४. मीठ, ५. अमृत, ६. नऊ प्रकारची भक्ती, ७. चार मुक्ती, ८. अग्रे, टोके, ९. कात.

# अध्याय चोविसावा

### श्रीरामांचे लग्नमंडपात आगमन

श्रीसद्गुरूरामचंद्राय नमः ।। श्रीरामप्रसाद सेवितां । समाधिसुख फिकें आतां । ऐसी उल्लासली सीता । श्रीरघुनाथाचेनि शेषें ।।१।। सद्गुरूपरात्पर उपरी । सर्वांतें सावधान करी । घटिका प्रतिष्ठिली अंतरीं । जीवनावरी[1] संख्येची ।।२।। अक्षरें अक्षर पळेंपळ । घडी भरता न लगे वेळ । लोक व्यापारें विकळ । काळ गेला नेणती ।।३।। घडी झेंगटातें[2] हाणित । काळ जावों न द्यावा व्यर्थ । तेणें काळें काळ अंत आणित । मुद्दल तेथें बुडालें ।।४।। नवल लोकांची नवाई । काळें गिळिलें न पडे ठायीं । दुमाही चौमाही गणिता वही । तेणें पाहीं नागवले ।।५।। सद्गुरू सांगे भरली घडी । उगेंच पाहताती वऱ्हाडी । ज्यांसी निजकार्याची तातडी । ते घडिया घडी साधिती ।।६।। श्रीरामसेवक साववित्त[3] । क्षणक्षण जावों न देती व्यर्थ । फळ विस्तारी रघुनाथ । तेणें सकळार्थ सफळित ।।७।।

वधूचे वस्त्रपरिधान- रुखवत समारंभ : सीतेसी नेसावया चिदंबर । नानारत्नांचे अलंकार । हृदयपदकीं नीळ मनोहर । विचित्र हार मुक्तलग[4] ।।८।। अहंकाराचें बीज भरडी । मोहममतेचा कोंडा दवडी । सोलींव डाळीची परवडी । भरलीं दुरडी[5] भावाची ।।९।। घेवोनि विवेकाची चाळणी । कणीक चाळिली सुगराणीं । फोलकट[6] त्यागिलें सांडोनी । गूळ गोडपणीं त्यामाजी ।।१०।। समूळ देंठीहून सुटलीं । निजपरिपाकें उतटलीं[7] । प्रमदास्पर्शें नाहीं स्पर्शिली । फळें आणिलीं फळार्थी ।।११।। रंभाफळें[8] परम पवित्रें । वक्राकृति अपवित्रें । सोलून सांडिलीं रामचंद्रें । केलीं अवक्रें श्रीरामें ।।१२।। लोकांचे फळीं चूतफळ[9] । तेंही माझारी गांठियाळ[10] । राम विस्तारी अच्युतफळ । फळें सफळ विदेही ।।१३।। सौभाग्यद्रव्य ठेविलें आधीं । धणे आणि हळदी । जिरें मेळविलें त्यामधीं । जेवी सद्बुद्धीं विवेक ।।१४।। श्रीराम मुख्य अहेवतंतु[11] । श्याममणि स्वयें ओंवितु । त्यामाजी रामनामसंकेतु । कंठीं एकांतु गळसरी ।।१५।। तोडूनि सांडिल्या गांठ्याळ गांठी । स्मरणमणी सीतेच्या कंठीं । बांधावया गळसरी गोमटी । राम जगजेठी स्वयें ओंवी ।।१६।। विमन त्यजोनि सर्वत्र । शुद्ध सुमनांचे हार । गुणेवीण[12] गुंफी रामचंद्र । सीता मनोहर तेणें शोभे ।।१७।। नाहीं मध्यमध्य गांठ्याळ । सबाह्य रसें अति रसाळ । इक्षुदंड[13] अति सोज्ज्वळ । आणिले सफळ फळांसीं ।।१८।। कांटे पुढें काळे नेवाळे । चहूं वर्णांहीवेगळे । ऊंस आणिले प्रेमसमेळें । सफळ फळें सीतेसी ।।१९।। एकें बीजेंवीण फळें । एकें त्वचेवीण रसाळें । एकें सबाह्य निर्मळें । सफळफळें सीतेसी ।।२०।। चहूं मुक्तींच्या सेवया कुसरी । श्रद्धेच्या परड्या दुरड्या भरी । देवोनि नवविधींच्या करीं । फळ बाहेरी काढिलें ।।२१।। ऋष्यशृंगाची कांता अलंकारें । शांता करवली सौभाग्यभरें । मिरवताहे अति गजरें । मंगळतुरें गर्जती ।।२२।। सूर्यवंशींच्या राजवल्लभा । जैसी सूर्याची निजप्रभा । तैशा शोभती निजांगशोभा । वेदगर्भा श्रुतिव्यक्ती ।।२३।। लग्नीं पहावया रघुपती । वऱ्हाडिणी आल्या श्रुतिस्मृती । कर्मकांडींच्या घेवोनि बुंथी[14] । मिरवताती निजगजरें ।।२४।।

वऱ्हाडी मंडळींचे जनकाकडून स्वागत : घेवोनि ऋषिवर्गाचा मेळ । निघाला दशरथ भूपाळ । राजे चालिले सुहृद सकळ । तुरें बंबाळ लागलीं ।।२५।। जनक आला जी सामोरा । नमस्कारिलें ऋषींश्वरां । मंडपीं बैसविलें नृपवरा । ऋषीश्वरांसमवेत ।।२६।। कन्या बैसवाया मूळपीठ । निप्रकृतीचें धुवट । वरी अंथरिलें चोखट । पुरोहित श्रेष्ठ शतानंद ।।२७।। कन्या आणिल्या बाहेरी । वस्त्रें अर्पून त्यांचे करीं । सर्वेचि नेल्या जी भीतरीं । त्या चमत्कारीं नेसल्या ।।२८।।

शब्दार्थ - १. पाण्यावर, २. घड्याळाला, तासाला, ३. सावध, ४. मोत्याचे, ५. परडी, ६. भूस, कोंडा, ७. भरास आलेली, पूर्णखारा पोचलेली, ८. केळी, ९. आंबा, १०. गुठळ्या असलेले, कोईने युक्त , ११. सौभाग्याचा दोरा, मंगळसूत्र, १२. दोरीवाचून, १३. ऊस, १४. आवरण झाकण.

फेडून मायामलिनांबरें[1]। रामनामें चूण मनोहरें। चौघी नेसल्या चिदंबरें। जयजयकारें आणिल्या ॥२९॥

सीतेसह चारही जनककन्यांचे मंडपात आगमन : वरावया निजात्मपती । चारी मुक्ति शृंगारिती । तैशा चौघी जणी येती । सीता सती मुख्यत्वें ॥३०॥ सीतेचा पल्लव[2] झळकत । उजेड पडला मंडपांत । सून देखोनि दशरथ । अति विस्मित पैं जाला ॥३१॥ तें तंव लेणियाचे लेणें । तिचेनि शोभती भूषणें। सीतेचेनि निजगुणें। अवघ्या सगुण भासती ॥३२॥ सीताअंगप्रभाकिरणें । लाजलें अंधाराचें जिणें । लोपलें उष्ण आणि चांदणें । प्राणी प्राणें तटस्थ ॥३३॥ न कळे दिवस ना राती । लवों विसरलीं नेत्रपातीं । समूळ शब्दांची जाली शांती । अवघीं पाहती टकमका ॥३४॥

चार बंधूंना फळे अर्पण : वसिष्ठ म्हणे सावधान । दशरथें देखिली सून । वेगीं करी फल अर्पण । श्रीराम लग्न साधावया ॥३५॥ लावावया श्रीरामलग्न । नाहीं उरलें व्यवधान[3]। सीता साधावया निधान । फल अर्पण करी वेगी ॥३६॥ पहिलेनि अर्पितां फळ । कार्य न साधे तत्काळ । निःशेष अर्पिल्या फळ सकळ । खूण भूपाळ पावला ॥३७॥ वसिष्ठाच्या निजवचना । सन्मुख बैसवोनि चारी सुना । निःशेष फळ अर्पिलें । जाणा वस्त्रभूषणांसमवेत ॥३८॥ पुरोहित जनकवंशीं । शतानंद धनउदासी[4] । दशरथें आणोनि त्यासी । घातलीं कळशीं कोटिद्रव्यें ॥३९॥ तो म्हणे राया दशरथा । देखिलिया रघुनाथा । द्रव्यलोभ नाहीं आता । रायें चरणीं माथा ठेविला ॥४०॥ द्विजा अग्रपूजासन्मान । दिधलें सुमनचंदन । सकळां तांबूल संपूर्ण । फलार्पण पैं जालें ॥४१॥ वसिष्ठ सांगे जनकासी । शीघ्र मूळ[5] यावें वरासी । दशरथासहित ऋषी । जानवशासी स्वयें आले ॥४२॥ बोलती वराडणी बेल्हाळा । कन्या देखतांचि डोळां । तहान भूक नाठवे सकळां । अपूर्व कळा सौभाग्यें ॥४३॥ अत्यंत सुरूपा चौघी जणी । समूळ सौंदर्याच्या खाणी । लावण्यपीठींच्या दिव्य योगिनी । सगुणगुणी गुणांच्या ॥४४॥ साधावया नवविधान । स्वयें श्रीराम सज्ञान । त्र्यंबक भंगोनियां जाण । दिव्यरत्न पर्णिलें ॥४५॥ येवोनि आद्या शक्ति जाण । स्वयें श्रीरामासी आपण । अदृश्यीं[6] बांधलें दृश्यकांकण[7] । जीवें निंबलोण[8] करोनि गेली ॥४६॥

सुमेधा राणी तेलवण करते : जनक अति संभ्रमेंसी । मूळ निघाला वरासी । सुमेधा अत्यंत उल्लासीं । तेलवणासी विस्तारी ॥४७॥ सूक्ष्म सेवेचे पैं लाडू । श्रीरामासी अत्यंत कोडू । वैराग्य शर्करा अति गोडू । तिळव्या जोडु सुस्वादु ॥४८॥ शाब्दिकशब्दाची खसखस। धुऊन सांडिली कसकस । लाडू वळले सुरस । शुद्ध चिदंश गुळगोडिया ॥४९॥ चार्वाकचारें फोडफोडूं । चैतन्यचारोळ्या पडिपाडू । चित्साकरा वळले लाडू । सुखसुरवाडू श्रीरामा ॥५०॥ अष्टांगयोगींचे अष्टदळबीज । त्याचेंही सोलूनि काढिलें निज । सुमेधा सुगंध लाडू वळिले सहज । दाखवी वोज तेलवणा ॥५१॥ सप्रेम सर्वांगीं कांटे । फणसाअंतरीं गोड गोमटे । त्याचेंही बीज काढूनि नेटें । लाडू गोमटे वळियेले ॥५२॥ अति सज्ञान विदेहभाज[9] गंगाफळाचें[10] निजबीज । सोलून लाडू वळिले सहज निजवोज तेलवणा ॥५३॥ कंटकांमाजी दांभिकबोरें । आंत आंबट वरी साजिरें । त्याचेंही बीज फोडून निजनिर्धारें । काढी बाहेर निजबीज ॥५४॥ सद्भावाचा गूळ गोडू । घालोनि वळिले लाडू । श्रीराम जाणे चवी निवाडू । पडिपाडू तेलवणा ॥५५॥ वैराग्य कडकडित कडकणें । सुमेधा आणि तेलवणें । श्रीराम उद्देशाचेनि गुणें । फुटणें तुटणें त्या नाहीं ॥५६॥ निजप्रपंचा उबगले[11]। तेचि वांकडे कानवले । मुरडी सद्भावें मुरडले । ते आवडले श्रीरामा ॥५७॥ संदेहाचें तेलवण । बोलावया बहुतां आंगवण । परी तें विदेहाचें तेलवण । अति कठिण अर्थितां ॥५८॥ वरासीं मूळ गज

---

शब्दार्थ - १. मायारूपी मलिन वस्त्रे, २. पदर, ३. अडसर, ४. धनाविषयी निरासक्त, ५. आमंत्रण, बोलावणे, ६. ब्रह्माचे ठिकाणी, ७. जडसृष्टिरूप कोकण, ८. कुरवंडी, ९. जनकस्त्री भोपळ्याचे, ११. कंटाळले.

गहिरे[1] । जनक आला अत्यादरें । सुमेधा सुवासिनीसंभारें । निजगजरें पैं आली ॥५९॥ देवोनि दशरथें सन्मान । दोहीं पक्षींचे सुहृज्जन । सभे बैसविलें प्रसन्नवदन । समाधान मंडपीं ॥६०॥ वर उपविष्ट सर्वांतरीं । भावें आणावया सभेभीतरीं । वसिष्ठ सद्गुरू हातीं धरी । राम बाहेरी तैं प्रकटे ॥६१॥ श्रीराम लावण्याची राशी । फेडी वेडी नाहीं त्यासी । त्याचेनि सुंदरत्व जगासी । सीमा रूपासी न करवे ॥६२॥ वसिष्ठगुरुवचनीं । श्रीराम आला सभास्थानीं । तेजें कोंदलीं नभमोदनी[2] । वरासनीं[3] बैसविला ॥६३॥ देखतां श्रीरामाचें मुख । तटस्थ जाले सकळ लोक । डोळ्या लागली टकमक । अंतरीं सुख कोंदलें ॥६४॥ श्रीरामाचेनि दर्शनें । होत डोळियां पारणें । इंद्रियें सुखावलीं संपूर्ण । बोलणें चालणें तटस्थ ॥६५॥ वसिष्ठ म्हणे सावधान । वेगीं समर्पा तेलवण । सुमेधा येवोनि आपण । पाहे वदन वराचें ॥६६॥ देखोनि श्रीरामाचें वक्त्र । परमानंदे धाले[4] नेत्र । देत तृप्तीचे ढेंकर । तरी अपार भुकेले ॥६७॥ वारंवार मुख न्याहळीं[5] । हरिखें निंबलोण उतरी । राम देखोनि सर्वांतरी । जीवें करी कुरवंडी ॥६८॥ सर्वांतरी राम परिपूर्ण । कवणा वाहूं तेलवण । वसिष्ठ येवोनि आपण । श्रीराम खुणेनें प्रबोधी ॥६९॥ ज्याचें देखतां दर्शन । सर्वांतरीं दिसे परिपूर्ण । तोचि श्रीराम मुख्य जाण । त्यासी तेलवण अर्पावें ॥७०॥ ऐकतां वसिष्ठाचें वचन । सुमेधा जाली सावधान । श्रीरामासी तेलवण । वस्त्रें भूषणें अर्पिलीं ॥७१॥ वऱ्हाडी बोलती नवाई । मुख्य वाहमाय[6] नोळखे जावाई । आतां आम्हीं करावें काई । वर लवलाही चालूं द्या ॥७२॥ जैसें श्रीरामासी तेलवण । तैसेचि भरतशत्रुघ्नलक्ष्मण । देवोनि दिव्यांबरें भूषण । समसमान पूजिले ॥७३॥

**चौघे कुमार घोड्यावरून मंडपाकडे येतात :** शुद्ध सत्वाचा श्वेत वारू । त्यावरी चढला रघुवीरू । सत्वाथिला अत्यंत धीरू । श्रीरामभारू तो साहे ॥७४॥ चौघांसीही समसमान । बैसावया श्वेतवाहन । चौघेही वर शोभायमान । जनजनयन आल्हादी ॥७५॥ लक्षूनि पूर्ण परमानंदु । प्रकटे सच्चिदानंदु । तैसे रामासमेत तिघे बंधु । निजात्मबोधु एकात्मता ॥७६॥ जेवीं कां ॐकार मुख्य वेदु । तोचि भासे चतुर्विधु । तैसेच हेही चौघे बंधु । निजबोध एकात्मता ॥७७॥ एकाचि साधूच्या शरीरीं । भासती पुरुषार्थ चारी । तैसीच या चौघांची परी । एकाकारीं निजबोधु ॥७८॥ जेवीं एक श्लोकीं चरण चारी । तैसीच या चौघांची परी । श्रीराम अर्थ श्लोकाक्षरीं । तेवीं चौघांभीतरीं एकत्व ॥७९॥ वर मिरवती एकत्रें । धरिलीं तन्मयाचीं निजछत्रें । निजबोधाचीं ढळती चामरें । दशविध[7] तुरें लागली ॥८०॥ घंटाकिंकिणींचे शब्द । मधुर शब्दांचे अनुवाद । वीणा वेणु मृंदगनाद । शुद्ध शब्दचि काहळा ॥८१॥ तुरें काहळा गर्जती भारी । निशाण[8] त्राहाटिलें गजरीं । दुमदुमलिया मंगळ मोहरी । नांदांतरीं मन निवे ॥८२॥ जैसा अनुहताचा गजर । तैसीं तुरें अपार । नादें कोंदलें अंबर । शब्दाकार नभ जालें ॥८३॥ श्रीरामवर्णनीं चतुर । चौघे भाट अति गंभीर । उठरा मागध विचित्र । वंशींचे वीर वर्णिती ॥८४॥ शब्दानुवादें अत्यंत प्रबळ । साही जणां वाद सबळ । शब्द करिती सळ[9] । अभिमान प्रबळ ज्ञानाचा ॥८५॥ आठही भाव अत्यंत प्रीतीं । सत्वाचा वारू[10] धरोन हातीं । श्रीरामसवें नित्य चालती । अन्यथा गति त्यां नाहीं ॥८६॥ सुखछायेचीं आतपत्रें[11] । चिदंबरींचीं पालवछत्रें । झळकताती तेजाकारें । श्रीरामचंद्रे उल्लास ॥८७॥ अनुभव स्वानंदे दुर्धर । भाट गर्जती अति गंभीर । दोहीं बाहीं कुंजरभार[12] । चालती स्थिर श्रीरामें ॥८८॥ श्रीरामें त्यजिल्या त्याग देऊनी । अष्टही महासिद्धि नाचणी । नाचती चपळपणीं । जनांलागूनी भुलवावया ॥८९॥ सिद्धि जेथें नाचता देखतीं । योगी साधक तेथें ढेसती[13] । शेखीं संन्यासी भुलती ।

---

**शब्दार्थ -** १. गंभीर, २. आकाश व पृथ्वी, ३. प्रमुख आसनावर, बैठकीवर उच्च स्थानावर, ४. तृप्त झाले, ५. लक्षपूर्वक पाहे, ६. वधूची आई, ७. वाजंत्रे, ८. विशिष्ट वाद्य, ९. छळ, १०. घोडा, ११. अबदागिरे, १२. हत्तींचे समुदाय, १३. भुलतात, फसतात.

पहाणें रघुपती विसरोनी ।।९०।। चैतन्य बुका घाली रघुनाथ । ज्यासी लागे तो धन्य जगांत । याचकाचे निवे चित्त । तैसें देत संज्ञेनें ।।९१।। शतानंद जगजेठी । घेवोनि विवेकवेताटी[1]। दृश्याची मांदी मागें लोटी । श्रीराम दृष्टीं पहावया ।।९२।। श्रीराममरूपीं अत्यंत प्रीती । वैष्णव पुढें नाचती । अहं सोहं सोडोनि वृत्ती । नित्य करिती स्वानंदें ।।९३।। श्रीरामासवें सुवासिनी । ब्रह्मविद्येच्या ब्राह्मणी । बोधपुत्राच्या जननी । सुखासनीं मिरवती ।।९४।। ऐसिया सुवासिनी समस्ता । निजबोधाच्या अक्षता । घालिती रघुनाथाचे माथां । लक्ष सर्वथा न चुकती ।।९५।। श्रीरामाचे सोयरे आप्त । योगी अनुभवी ज्ञानी मुक्त । त्यांसी वहनें रघुनाथ । जें जे देत तें ऐका ।।९६।। एका सलोकता घोडे । एका समीपता रथ चोखडे । एका स्वरूपता गज गाढे । भवभंगडे[2] रणरंगी ।।९७।। सायुज्य चवरडोलावरी । बैसविले निजांधिकारी । त्यासी जवळोनिया दुरी । क्षणभरी जाऊं नेदी ।।९८।। भरून रज तम औषध । अग्नियंत्रें करोनि सिद्ध । श्रीरामासीं अति विनोद । एक प्रबुद्ध दाविती ।।९९।। चैतन्याग्नि देवोनि देहीं । ममता जाळिली हवाई[3] । गगनास उसळोनियां पाहीं । ठायींच्या ठायीं निवाली ।।१००।। सलोभ लोभाच्या चिचुंदरी । विवेके जाळोनि टाकिल्या दुरी । त्या पडति जनांवरी । उरीं शिरीं जाळितां ।।१।। देवोनि उपशम अनळा । जाळिला क्रोधाचा भुइनळा । भडभडां निघोनि ज्वाळा । तोही तत्काळ निमाला ।।२।। श्रीरामयुक्तीच्या स्वलीळा । जाळित कामाचा हातनळा । जाळूं नेणती त्या अबळा । जीवीं जिव्हाळा पोळितु ।।३।। पाहतां अत्यंत कठीण । चिन्मात्र अग्नि लावून पूर्ण । जाळिला अहंकारबाण । पळे जीवपण दचकोनी ।।४।। अहंममता-कामक्रोधशांती । करीत येतसे रघुपती । वृथा वाढविली युक्ती । ऐसें संतीं न म्हणावें ।।५।। जाहल्या अहंममतादिशांती । उजळोनि निजात्मचंद्रज्योती । प्रकटली परमदीप्ती । तेही स्थिति अवधारा ।।६।। समूळ अंधार नुरेचि तेथ । उष्ण चांदणें घोटीं समस्त । तेज प्रकटलें अत्यद्भुत । सुखें डुल्लत श्रीरामें ।।७।। एवं नाना परींचे त्याग । पदोपदीं जी अनेग । ओवाळिती जीवभाग । स्वयें श्रीराम पैं आला ।।८।। कन्येचिया द्वारापासीं । एके भागीं सिद्धिदासी । शुकनालागीं श्रीरामासीं । पूर्ण कलशेंसीं[4] तिष्ठती ।।९।। दुसरे भागीं द्वाराप्रती । श्रद्धा कीर्ति धृति विरक्ती । जीवे ओंवाळावया रघुपती । स्वयें निष्ठती सर्वदा ।।११०।। एकीं त्याग दिधला निःशेष । एकीं दिधला परम हर्ष । एकीं दिधले अनंत सुख । एकीं आवश्यक निजवास ।।११।। जीवभावाचिया मुदा[5] । ओंवाळूनि सांडी सुमेधा । सोहळा देखोनि निर्वंदा । परमानंदा ते पावे ।।१२।। द्वारीं प्रवेशला रघुनाथ । चौघां बंधूंसमवेत । अवघे जयजयकार करीत । मंडपाआंत आणिले ।।१३।। छेदावया हृदयबंधु । गुरुवाक्येंसी रिघे बोधु । तैसे घेवोनि तिघे बंधु । राम प्रसिद्धु स्वयें आला ।।१४।। दशेंद्रियें अति समर्थ । दशेंद्रियांसी अति अलिप्त । तोचि महाराज दशरथ । सोहळा समस्त त्याचेनि ।।१५।। एकाजनार्दना शरण । मंडपा श्रीराम आगमन । पुढें मधुपर्कविधान । श्रोतीं सावधान परिसावें ।।१६।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीराममंडपागमनं नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ।।२४।। ओंव्या ।।११६।।

## अध्याय पंचविसावा

### जानकीचे पाणिग्रहण

श्रीरामांचे जनकाकडून स्वागत; आसनादि दान : श्रीरामचंद्राय नमः ।। श्रीराम मंडपाआंत । आला चहूं वरांसमवेत । जनकासी आल्हाद बहुत । आला दशरथ ऋषियुक्त ।।१।। जनकें दिधला सन्मान । गाद्या पडगाद्या[6] वरासन । मृदुलिया लोटांगण[7] । ऋषिससंपन्न सभेसीं ।।२।।

शब्दार्थ - १. विवेकरूपी वेताची काठी, २. संसारनाश करणारे, ३. चंद्रज्योत, ४. पाण्याने भरलेल्या घागरी घेऊन, ५. भाताच्या मुदा, ६. गिरद्या, ७. लोडे.

मधुपर्क : मधुपर्काचें विधिविधान । चारी पुरुषार्थ चवाई[1] जाण । त्यावरी समाधि-सुखासन । वरासन चौघांसी ॥३॥ सदोदिता आवाहन[2] । अधिष्ठानासी आसन । कर्मरहितासी आचमन । चरणक्षाळण अचरणा ॥४॥ श्रीराम भूषणां भूषण । त्यासी अलंकार आभरण । निरावरणासी प्रावरण । सर्वगता आगमना वाहनादिक ॥५॥ सहजासी पाठीपोट । अखंडासी वस्तिपीठ । निःशब्दा शब्द स्पष्ट । निरंतरा अंतःपट लग्नार्थ धरिती ॥६॥ श्रीराम परब्रह्म स्वतंत्र । तोही धरी ब्रह्मसूत्र । वेदविधान आचार । श्रीरामचंद्र प्रतिपाळी ॥७॥ असो हा अगाध परमार्थ । जनक आला मधुपर्कार्थ । त्याचा जाणोनि भावार्थ । श्रीरघुनाथ अंगीकारी ॥८॥ सर्व समता समसमान । तेंचि श्रीरामासी आसन । आशानैराश्यासी अर्घ्यदान । तेणें श्रीचरण समर्घ्य जाले ॥९॥ पाद्यार्घ्यालागीं तीर्थ । त्रिगुणत्रिवेणी गुणातीत । चैतन्यप्रवाहें पुनीत[3] । यथोचित चिद्‍गंगा ॥१०॥ स्वयें सुमेधा घाली उदक । चरण प्रक्षाळी विदेह जनक । तळीं तीर्थें सकळिक । आलीं आवश्यक चरणतीर्था ॥११॥ श्रीरामाचें चरणतीर्थ । सेवितां तीर्थे होती पुनीत[3] । सुर नर सिद्ध आले तेथ । लग्नीं रघुनाथ पहावया ॥१२॥ सुमेधा शुद्ध निजजीवन[4] । घाली श्रीरामासी आचमन । चोविसां नमांसीं संपूर्ण । सर्वापोशन कर्माचें ॥१३॥ परब्रह्मींचा अधिष्ठात्रा । त्यासीही देती ब्रह्मसूत्रा[5] । मान देतो वृद्धाचारा । श्रुतिव्यवहारा संरक्षी ॥१४॥ टिळे माळा शुद्ध सुमनें । चिद्रत्नादि दिव्यभूषणें । भावें पूजिलें चौघांकारणें । परिधानें पीतांबरें ॥१५॥ उदक घालितां मूळांत । शाखा पल्लव टवटवित । तेंवी पूजिल्या रघुनाथ । सालंकृत बंधु चारी ॥१६॥ रसस्वाद रसना घोंटी । तेणें इंद्रियां पुष्टितुष्टी । राम पूजियेल्या जगजेठी । बंधुत्रिपुटी संपूज्य ॥१७॥ मुख्य स्थानीं अग्नौकरण[6] । तेणें सुखी देवब्राह्मण । तेंवी पूजिल्या रघुनंदन । चौघे जण संपूज्य ॥१८॥ एका मनासी संबोधन । तेणें इंद्रियां समाधान । तैसे अधिष्ठान रघुनंदन । तेणें बंधु आपण संतुष्ट ॥१९॥ दधिमधु एकत्रता[7] । घातलें चौघांचिया हातां । विदेहाच्या निजभावार्था । श्रीरघुनाथा आते प्रीती ॥२०॥ विपरीत वेदविधान । दधि मधु प्राशी रघुनंदन । निष्कर्मासी कर्मबंधन । विस्मित जन सुरसिद्ध ॥२१॥ जनक म्हणे प्रतिगृह्यतां[8] । प्रतिगृह्णामि[9] म्हणविती रघुनाथा । विदेहें सोडिलिया अहंता । प्रतिग्राह्यता सर्वांची ॥२२॥ संकल्प सांडितां नरेंद्र । दधि मधु सेवितां रामचंद्र । सुमेधा घालीतसे पैं नीर । प्रक्षाळी कर श्रीराम ॥२३॥ सर्वेचि केलें शुद्धाचमन । सद्‍गुरू म्हणती सावधान । नाहीं विलंबु व्यवधान । वेगीं सुलग्न साधावें ॥२४॥ श्रीरामपद रितें न पडे । पूर्णता पायीं पायीं मांडे । दोन्ही सद्‍गुरू दोहींकडे । वरू वाडेंकोडें चालविले ॥२५॥

सीतेसह चारही कन्यांचे गौरिहरपूजन : गौरीहरीं सीता सती । गौरीहरातें शिंपिती । शिवासी श्रीरामाची प्रीती । आला लग्नार्थीं भवानीसीं[10] ॥२६॥ मुख्य माया अंतःपट । तिसी श्रीरामें शेवट । जनक निजभाग्यें वरिष्ठ । सोयरा श्रेष्ठ श्रीराम ॥२७॥ श्रीरामनामाचें नित्य स्मरण । अंतःपटनिवारण । त्यासीही अंतःपट जाण । धरिती ब्राह्मण वेदार्थी ॥२८॥ सुटावया देवांचे बंधन । मुख्य सीताचि कारण । तिचें साधावया सुलग्न । रवि सावधान घडी राखे ॥२९॥

लग्नघटका भरताच "सावधान" म्हणून उच्चार : घडी भरतांचि न लगे क्षण । म्हणती नित्यसावधान । सत्य सर्वेगे चढे जीवन । नाहीं व्यवधान शब्दाचें ॥३०॥ सांडा चौघींची उठाउठीं । राहा निजदृष्टीं सावधान ॥३१॥ अंतःपट आहे ज्यासी । आधीं सावध करा त्यासी । अक्षर निमिष श्वासोच्छ्वासीं । घडी वेगेंसीं भरताहे ॥३२॥ यालागीं नित्यसावधान ।

---

शब्दार्थ – १. चौरंग, २. प्रार्थनापूर्वक बोलावणे, ३. पवित्र, ४. पवित्र उदक, ५. यज्ञोपवीत, जानवे, ६. श्राद्धामध्ये साग्निक अग्नीत, व निरग्निक ब्राह्मणाच्या हातावर आहुती देतात त्या, ७. एकत्र करून, ८. अंगीकार करा, ९. स्वीकार करतो, १०. पार्वतीसह.

सद्गुरु म्हणताहे आपण । वचना न द्यावें प्रतिवचन । सावधान निजरूपीं ॥३३॥ शब्दार्थ महामौन । धरी तो नित्यसावधान । ज्यासी शब्दार्थी अभिमान । असावधान तो सदा ॥३४॥ अंगीं जाणिवेचे[१] जाणपण । वचना न देती प्रतिवचन । तेणें वचनें त्यांसी दूषण । सावधपण त्यां नाहीं ॥३५॥ अति समयो सन्निध लग्न । उभय भागीं सावधान । अच्युतचिंतनें राखावें मन । अत सुलग्न स्वानंदें ॥३६॥ ॐपुण्याहं वचन । पूर्णतेचें पूर्णपण । त्या पूर्णता रघुनंदन । निजात्मलग्न स्वयें साधी ॥३७॥

अंतरपाट काढल्यानंतर वधूवर परस्परांना वरतात : ॐपुण्याहं मुळींची गोष्टी । तेणें शब्द विरे प्रणवाच्या[२] पोटीं । अंत:पट फिटला उठाउठीं । सीता गोरटी वरी राम ॥३८॥ नयनीं नयन संलग्न । एकचि जालें देखणेंपण । प्राणपती वरितां पूर्ण । प्राणें प्राण एक जालें ॥३९॥ वसिष्ठाच्या लग्नाक्षता । एकात्मता पंचभूता । श्रीरामे वरिली सीता । एकात्मता निजलग्नीं ॥४०॥ एक अवयवीं एक अवयव । एक जाले सीताराघव । एक जाले जीवभाव । लग्न अपूर्व श्रीवसिष्ठे ॥४१॥ सीतेचिये निजमाथां । श्रीराम घाली लग्नाक्षता । तोचि हस्त पावे सीता । सुखरूपता स्वानंदें ॥४२॥ श्रीरामाचें निजमाथां । अक्षता घालूं जातां सीता । सर्वांभूतीं देखे रघुनाथा । कर्तव्यता सलज्ज ॥४३॥ पाणिग्रहणीं रघुनाथा । पावोनियां जी सर्वथा । क्रिया पौरुषल्या[३] समस्ता । निष्कर्मता श्रीरामें ॥४४॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । श्रीरामही तैशाच परी । सीता वरी निजात्मता[४] ॥४५॥ श्रीराम स्वयें चैतन्यमूर्ती । सीता तंव ते चिच्छक्ती । लग्न लागलें एकात्मप्रीतीं । चतुरोक्ती चहूं ठायीं ॥४६॥ सीतेनें वरिला श्रीरामचंद्र । ऊर्मिलेने वरिला सौमित्र । मांडवीनें वरिला भरत वीर । शत्रुघ्न शूर श्रुतकीर्तिनें ॥४७॥ चौघी कन्या चौघे वर । लग्न लागलें सविस्तर । वोहरें शोभती मनोहर । जयजयकार प्रवर्तला ॥४८॥

जयजयकार, मंगलवाद्यवादन, संगीतनृत्यादि सोहळा : ऋषी करिती जयजयकार । सुमनें वर्षती सुरवर । मंगळतुरांचा गजर । नादें अंबर कोंदलें ॥४९॥ सुरीं[५] दुंदुभित्राहाटी[६] । भेरीमृदंग-किंकाटी । नाद न समाये नभाचे पोटीं । निधा[७] वैकुंठी उठत ॥५०॥ रंभा उर्वशी नाचणी[८] । नाचती जनकाच्या रंगणीं[९] । गंधर्व मधुर गाती गाणीं । ओंवाळणी दोहीं भागीं ॥५१॥

पाणिग्रहण, कंकणबंधन : असो हें जालें पाणिग्रहण । वोहरां बांधावया कंकण । वसिष्ठ येवोनि आपण । सूत्र परिधान सूतवी ॥५२॥ गगनगर्भीचा सूक्ष्म तंतु । तोचि अष्टधा वेढितु । स्थूळाभिमानें दृश्य होतु । मग तोडितु दों ठायीं ॥५३॥ अखंड खंड केलें जाण । घालोनि त्रिगुणांचे वळण । अर्ध स्त्रीनामें कांकण । अर्ध परिपूर्ण पुरुषत्वें ॥५४॥ फेडिलीं मायेची वधूवस्त्रें । श्रीराम मेचुनि अच्छिद्रें । अष्टपुत्र्या पीतांबरे । नेसलीं वोहरें स्वानंदें ॥५५॥ मायामळिण वधूवस्त्रासी । न घे शतानंद उदासी । वसिष्ठ न घे वरवस्त्रासी । दोघे उदासी पुरोहित ॥५६॥ घ्यावया मायामळिण वासासी[१०] । कलहो सलोभ सगोत्रजांसी । विसरोनियां निजात्मत्वेंसीं । देह लोभासीं भांडती ॥५७॥ कोट्यनुकोटी निजधना । जनकें दिधली वरदक्षिणा । सौभाग्यद्रव्यें देतां वाणा । निंबलोणा उतरिती ॥५८॥ जीवीं जीवा पडली मिठी । बाह्य पालवा[११] बांधिली गांठी । राम देखोनियां दृष्टीं । उल्लास पोटीं जानकीच्या ॥५९॥

विवाहहोम वगैरे : विवाहहोम निजनिर्धारीं । वोहरें[१२] आणावीं तुम्हीं घ्यावी ॥६०॥ हांसें आलें रघुनाथासी । विपरीत विधि लौकिकासी । वसिष्ठ म्हणे श्रीरामासी । वृद्धाचारासी प्रतिपाळीं ॥६१॥ स्वयें श्रीराम विचारी । माझी प्रकृति मजमाझारी । न घेतां बैसली

---

शब्दार्थ - १. ज्ञानाचे, २. आकाराच्या, ३. खुंटल्या, ४. एकरूपतेने, ५. देवसमुदायात, ६. नगारे वाजविणे, ७. प्रतिशुद्ध, ८. नृत्यांगना, ९. सभास्थानी, १०. वस्त्राला, ११. पदराला, १२. वधूवरांना.

कडेवरी । मजहूनि दुरी होऊं नेणे ॥६२॥ न बैसवितां बैसली कडिये । जीवें भावें मज हे पढिये[1] । नांवरूपाचे मज मढिये[2] । उभवोनि गुढिये हे नांदे ॥६३॥ हे माझेनि शोभे रूपवंती । माझेनि इसी नित्यस्थिती । माझेनि इसी गमनगती । लाजूं किती लौकिका ॥६४॥ तिसी न लावितां हात । नोवरी उचली रघुनाथ । अलिप्तपणें घेवोनि येत । तेणें विस्मित ऋषिसमूह ॥६५॥ चहूं पुरुषार्थां चारी मुक्ती । तैसी चारी वोहरें शोभती । कडे घेतल्या कवण्या रीतीं । तेही स्थिती अवधारा ॥६६॥ सायुज्यता सीता सती । तीसी उचली रघुपती । उर्मिला स्वरूपता शोभती । उचलिली प्रीतीं सौमित्रें ॥६७॥ मांडवी स्वयें समीपता । भरतें उचलिली तत्वतां । श्रुतकीर्ति सलोकता । होय उचलिता शत्रुघ्न ॥६८॥ एवं वोहरें आलीं वेदिकेप्रती[3] । शतानंदें विधिवेदोक्तीं । केली विवाहहोमसमाप्ती । द्विजां देती धनधान्य ॥६९॥ जनकें केला अनुक्रम । येथें करावा चतुर्थ होम । चारी दिवस संभ्रम । सोहळा परम करावा ॥७०॥

धेंडा नाचविणे : धेंडा नाचवावा येथ । तें पहावया जन आर्तभूत[4] । वचन न मानीच रघुनाथ । भविष्यार्थ जाणोनी ॥७१॥ धनुर्भंगाचा अनुक्रम । क्रोध पावेल परशुराम । दारुण होईल संग्राम । अति दुर्गम दुर्धर ॥७२॥ जमदग्नीचा क्रोधानळ । परशुरामाचा क्रोध तुंबळ । उभय क्रोधें गर्वप्रबळ । नगरी तत्काळ जाळील ॥७३॥ प्रजा पीडती समस्त । हें श्रीरामाचें मनोगत । वसिष्ठ जाणे इत्थंभूत । आणिक हृद्गत रामाचें ॥७४॥ वऱ्हाडाहूनि अधिक । पुढें कार्य आहे अधिक । आणि अयोध्येसी जातां आवश्यक । जाणें एकाएक वनवासा ॥७५॥ येथें जालें पाणिग्रहण । लंकेसी मारिल्या रावण । तैं सीतेचें माझें होईल लग्न । सोहळा संपूर्ण युद्धाचा ॥७६॥ तेथें नाचेल रणधेंडा । ओवाळणी राक्षसमुंडां[5] । पडतील अति उदंडा । बाणप्रचंडासमवेत ॥७७॥ जानकीविवाह अल्प सोहळा । सोडणें आतां देवांची बंदिशाळा । तोडणे आहे ग्रहांची शृंखळा । तो आगळा उत्साह ॥७८॥ श्रीरामाच्या निजभावासी । वसिष्ठें जाणोनि सावकाशीं । तेणें सांगितलें जनकासी । वेगीं वोहरांसी बोळवीं ॥७९॥ श्रीराम नव्हे गा प्राकृत । याचे वचन ब्रह्मलिखित । जनकें मानोनि निश्चित । हर्षयुक्त बोळवी ॥८०॥

वधूवरांना वस्त्रलंकारादि आंदण देणे : वधूवरांसी आंदणें । दिव्यालंकारभूषणें । नानापरींचीं आभरणें । बहु सुवर्ण गजपृष्ठीं ॥८१॥ अति सूक्ष्में रोमांबरें[6] । पट्टकूलें[7] पीतांबरें । अति मोलाची नानाकारें । वस्त्रें विचित्रें दिधलीं ॥८२॥ मुक्ताफळांच्या झालरी । दिधल्या रथांच्या हारी । गज़ गर्जती दळभारीं । अलंकारीं डुल्लती ॥८३॥ रत्नालंकारीं मनोहर । अमित दिधले असिवार[8] । पदक कंठ्या दासी अपार । नवसर हार शोभती ॥८४॥ जनकासी अति उल्लास । सेवा करावया श्रीरामास । मुकुटकुंडलांचे घोंस । दिधले बहुवस विश्वासीं ॥८५॥ सुमेधा बोले भाववचन । अनन्यभावें आम्ही शरण । जीव श्रीरामासी दिधला आंदण । बाह्य आभरणां कोण पाड[9] ॥८६॥ जनक बोले हर्षयुक्त । देह गेह[10] वित्त जीवित । केलें रामार्पण समस्त । जाण निश्चित सुमेधे ॥८७॥ ऐसीं दोघे अति उल्लासीं । आंदणें देवोनि वोहरांसीं । जनक बोळवीत रामासी । बहुमार्गासी स्वयें आला ॥८८॥

प्रयाणसमयी रामांचे अभिवादन, आशीर्वादग्रहण : विश्वामित्रें तईं आपण । करूनियां वसिष्ठासी नमन । दोहीं रायांसी पुसोनि जाण । करी गमन स्वाश्रमा ॥८९॥ रामलक्ष्मण दोघे जण । करिती साष्टांग नमन । ऋषीनें देवोनि आशीर्वचन । करी गमन स्वाश्रमा ॥९०॥ श्रीराम म्हणे मिथिलानाथा । येथोनि आपण राहावें[11] आतां[11] । येरें वसिष्ठचरणीं ठेविला माथा । होय पुसता व्याह्यासी ॥९१॥ दशरथें अति सन्मान । करूनि दिधलें आलिंगन । जनक श्रीरामासी

शब्दार्थ - १. आवडती, २. झाकण, ३. बोहल्याजवळ, ४. उत्सुक, ५. राक्षसांच्या शिरांना, ६. लोकरीची वस्त्रे, शाली वगैरे, ७. रेशमी वस्त्रे, ८. स्वार, ९. किंमत, परवा, १०. घर, ११. आता पुढे येऊ नये, आपण परतावे.

आपण । घाली लोटांगण सद्भावें ॥९२॥ कुशध्वजासमवेत । आलिंगूनी चारी जामात । जनक अत्यंत हर्षयुक्त । निघे त्वरित निजनगरा ॥९३॥

सर्वांचें अयोध्यकडे गमन : करितां अयोध्यागमन । परशुरामाचें आगमन । ज्याचेनि विश्व कंपायमान । अति दारुण भयानक ॥९४॥ रामें श्रीरामा पडिपाडु[1] । रामा श्रीरामा युद्ध दृढु रामें श्रीरामा प्रेम गोडु । कथाकैवाडु[2] अवधारा ॥९५॥ एकाजनार्दना शरण । जालें जानकीपाणिग्रहण । श्रीरामें रामा समाधान । कथा गहन अति गोड ॥९६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां जानकीपाणिग्रहणं नाम पंचविंशतितमोध्यायः ॥२५॥ ओंव्या ॥९६॥

## अध्याय सव्विसावा

### परशुराम गर्वपरिहार

लग्नाचे वऱ्हाड अयाध्येकडे निघाले : श्रीसद्गुरूरामचंद्राय नमः । चौघी बहिणींसहित जाण । जालें जानकीपाणिग्रहण । जनकें केली बोळवण[3] । सुख संपूर्ण दशरथासी ॥१॥ चौघे पुत्र चौघी सुना । कीर्ति न समाये त्रिभुवना । येव्हढे आल्हादें जाणा । अयोध्याभुवना निघाला ॥२॥ सनद्ध केलिया दळभार । महामदें गर्जती कुंजर । घंटाकिंकिणीं सालंकार । पताकीं अंबर शोभत ॥३॥ घोडे नाचविती वीर । जी जी मा मा थीर थीर । तीपायीं असिवार[4] । अति अरुवार[5] नाचती ॥४॥ अढाऊं झेली[6] साबळधर[7] । कोयतेकार धनुर्धर । चालती पायांचे[8] मोगर[8] । अलगाइत[9] बाणाइत ॥५॥ वोढणिये थैकार देत । जेठिये तळपत चमकत । ऐसें सैन्य पुढें चालत । भाट गर्जत कैवारें ॥६॥ राजे मुकुटाचे वरिष्ठ । पाठीसीं चाले घनदाट । अतिरथी घडघडाट । सुख उद्भट दशरथा ॥७॥

मार्गातील अपशकुनांमुळे राजा साशंक : राजा वसिष्ठ सकळ जन । समानरथीं समसमान । चालती सुखसंपन्न । तो पुढें अपशकुन देखती ॥८॥ सव्य जातात पैं तास । अपसव्य जाती वायस । मयूरें गाळिती पीस । सर्प मुंगुस भांडती ॥९॥ भालुवा भुंकिती सन्मुख । पक्षी करकरिती अग्निमुख । युद्ध होईल अचुक । थोर धुकधुक रायासी ॥१०॥ श्रीराम शकुन अपशकुन । दोनी देखे समसमान । नाहीं भय कंपायमान । नित्य सावधान निर्भयत्वें ॥११॥ राजा सांगे वसिष्ठासी । अपशकुन कां होती आम्हांसी । दिशा धुमधुमित चौपासीं । शशिसूर्यांसी प्रभा मंद ॥१२॥ दिवसा ग्रहगण गगनस्थ । एक पूर्वे एक पश्चिमे जात । रवि चंद्र परिघ करित ।अति उत्पातदायक ॥१३॥ सन्मुख गगनाचे पोटीं । अंधकारलिया दिठी । वसिष्ठा तूं सर्मज्ञ सृष्टी । हे यथार्थ गोष्टी सांग मज ॥१४॥

वसिष्ठांचे दशरथाला आश्वासन : राया जीं जीं चिन्हे दिसती । तेणें दुस्तर विघ्नप्राप्ती । परी आम्हांसवे चालती शांती । विघ्नें आम्हांप्रती विमुख ॥१५॥ अपशकुन पूर्वे जात्यासी । शकुन पश्चिमेच्यासी । तेंवी भूतीं भगवद्भाव ज्यासी । विघ्नें त्यासी निजविजयो ॥१६॥ येरवीं विघ्नांचें सूचक । युद्ध होईल ठाकठोक । विजयी होईल रघुकुळटिळक । हें आवश्यक निजभावीं ॥१७॥ रामनामाच्या नामोक्तीं । विघ्नें चरणां शरण येती । तो श्रीराम असतां सांगाती । विघ्नांची प्राप्ती निजविजयो ॥१८॥

प्रचंड वावटळीतून परशुराम येतात : ऐसे दोघे बोलत बोली । तंव उठली वाहुटळी । नभ व्यापिलें धुळीं । संज्ञा मोडली सैन्याची ॥१९॥ लागतां त्या वायूची झडप । सप्त सागर सप्त द्वीप । तेणेंसीं पृथ्वी सकंप । सुटे चळकांप मेरूसी ॥२०॥ त्यामाजी उठली विकट[10] हाक । सैन्य मूर्च्छित पडे निःशेष । दशरथें घेतला धाक । राम निःशंक निजनिधडा[11] ॥२१॥ विद्युत्प्राय[12]

शब्दार्थ - १. थोरीव, मोठेपणा, २. कथावैचित्र्य, ३. पाठवणी, ४. स्वार, ५. मनोहर, ६. वीरविशेष, ७. भाला धरणारे, ८. पायदळ, ९. पुढे धावणारे, १०. भयंकर, ११. मोठ्या धैर्याचा, १२. विजेप्रमाणे.

जटा शिरीं । सतेज परशु खांद्यावरी । धनुष्यबाण घेवोनि करीं । श्रीरामावरी चालिला ॥२२॥

वसिष्ठांकडून स्वागत, दशरथ भयभीत, त्याची परशुरामास प्रार्थना : परशुरामातें देखून । वसिष्ठें केले पूजन । ते पूजा भार्गवें अंगीकारून । चालिला आपण श्रीरामावरी ॥२३॥ अत्यंत पराक्रम देखोन । दशरथ जाला कंपायमान । घालोनियां लोटांगण । दीनदानव बोलत ॥२४॥ परशुरामा तुझी थोरी । तीन सप्तकें पृथ्वी निःक्षत्री । करून दिधली द्विजकरीं । शस्त्र त्वां करीं संन्यासिलें[1] ॥२५॥ तू क्षत्रियांचा कर्दनकाळ । हें तुझिया ब्रीदाचे शीळ । श्रीराम माझें केवळ बाळ । त्यावरी प्रबळ क्रोध न करीं ॥२६॥ श्रीरामातें मारिसी । तेचि मरण आम्हां सर्वांसी । येव्हढे करावया कदनासी । उचित तुम्हांसी नव्हे स्वामी ॥२७॥ मी पुत्रार्थी अति दीन । पुत्रभयें अति कृपण । मज द्यावें पुत्रदान । घाली लोटांगण नृपनाथ ॥२८॥

परशुरामाचे श्रीरामांना आव्हान व दोघांचा संग्राम : ऐसें दशरथभाषित । तें उपेक्षोनियां समस्त । जेथें होता रघुनाथ । भार्गव तेथें स्वयें आला ॥२९॥ रामा श्रीरामा झुंजारी । श्रीराम रामाते निवारी । रामा श्रीरामा प्रीति पुरी । ऐक्य करी निजबोध ॥३०॥ त्या दोघांचा निजसंग्राम । सुरनरवीरां अति दुर्गम । युद्धीं पावोनि निजवर्म । उपरभ[2] निजबोधें ॥३१॥ देखोनियां रघुनंदन । भार्गव सोडी दारुण बाण । श्रीरामें सांडिलें तोडून । क्रोधें परिपूर्ण जामदग्न्य ॥३२॥ परशुराम सोडी दिव्यास्त्रें । श्रीराम निवारी क्षणमात्रें । कोपें सोडिलीं निर्वाणशस्त्रें । तींही रघुवीरें निवारिलीं ॥३३॥ रेणुका दिधल्या भार्गवहातीं । दोनी आपुल्या निजात्मशक्ती । सकळ शस्त्रास्त्रांच्या अंतीं । त्या निर्वाणार्थीं सोडाव्या ॥३४॥ त्या काळी कराळी उभय शक्ती । जाणोनि राहिल्या रामाप्रती । तिहीं ओवाळून रघुपती । श्रीरामभात्याप्रती प्रवेशल्या ॥३५॥

श्रीरामाच्या सामर्थ्यापुढे परशुराम निष्प्रभ ठरल्यामुळे उद्विग्न : भार्गव म्हणे नवल आतां । माझ्या शक्ति याव्या माझे हाता । त्या प्रवेशल्या श्रीरामभात्या । साह्य रघुनाथा त्या जाल्या ॥३६॥ माझ्या निर्वाण निजशक्ती । जावोनि राहिल्या श्रीरामाप्रती । हें आश्चर्य मानोनि चित्तीं । छळणें वचनोक्ती बोलत ॥३७॥ जीं जी शस्त्रें म्यां प्रेरिलीं । तीं तीं स्वयें त्वां निवारिलीं । परी आपुलीं नाहीं सोडिलीं । हे उणीव आली रघुनाथा ॥३८॥ जाणसी शस्त्रांचें निवारण । परी नेणसी शस्त्रांचें प्रेरण । हेंचि तुज उणेपण । शौर्य संपूर्ण तुज नाहीं ॥३९॥ ऐकोनि परशुराम-वचन । श्रीरामें केले नमन । ब्राह्मणापुढें उणेपण । सर्वथा जाण आम्हांसी ॥४०॥

श्रीराम उवाच –

अयं कंठः कुठारस्ते कुरु राम यथोचितम् । निहंतुं हंत गोविप्रान्न शूरा राघवा वयम् ॥१॥

'गो-ब्राह्मण क्षत्रिय हे अवध्य' असे श्रीरामांचे परशुरामास उत्तर : भार्गवा परशु तुझ्या हातीं । म्यां कंठ ओपिलासे तुजप्रती । जें करणें असेल तुझे चित्तीं । तें त्वां निश्चितीं करावें ॥४१॥ गाई ब्राह्मण करावया घात । स्वप्नीं नुपजे मनोरथ । त्यांवरी उचली शस्त्रहात । ऐसा सूर्यवंशात शूर नाहीं ॥४२॥ गाई आणि ब्राह्मणांपुढें । आमुचें शौर्य बापुडें । तुझे निवारावया कुऱ्हाडे धनुष्यबाण पुढें म्यां धरिले ॥४३॥

विष्णुचाप सज्ज करण्याचे श्रीरामांना आव्हान : ऐकोनि श्रीरामाचें वचन । परशुराम हास्यवदन । परिसोनि हरचापभंजन । तुज ठाकूनि जाण मी आलों ॥४४॥ असो युद्धाची अटाटी[3] । सांडिली शस्त्र धरावयाची गोष्टी । विष्णुचाप आहे माझे मुष्टीं । ते तूं जगजेठी सज्जीं पा ॥४५॥ जरी तूं हें सज्जिसी संपूर्ण । तरी तुवां मज जिंतिलें जाण । श्रीराम म्हणे हें भाषण । मज दूषण द्विजविषयीं ॥४६॥ तूं अगाध ब्राह्मण ब्रह्मचारी । पितृसेवेची परम थोरी । तुझी आज्ञा वंद्य शिरीं । विष्णुचाप करीं धरिता जाला ॥४७॥ श्रीराम म्हणे भार्गवरामा ।

---

शब्दार्थ - १. ठेविले, २. शांती, ३. दांडगी खटपट.

तुझेनि तीर्थें प्रताप आम्हां । तेणें प्रतापें द्विजोत्तमा । धनुर्वर्मा सज्जीन ॥४८॥ शिवचापापरीस भारी । विष्णूचापाची पैं थोरी । श्रीरामें धरोनि करीं । क्षणामाझारीं सज्जिलें ॥४९॥ भार्गवाचे दृष्टीपुढां । श्रीरामें सज्जिला विष्णुमेढा[1] । ठाण मांडोनि निधडा । बाण गाढा जोडिला ॥५०॥ जैसा अंतका अंतक । समूळ कळिकाळा घातक । देखोनि भार्गवें घेतला धाक । अलोलिक श्रीराम ॥५१॥ श्रीरामाच्या प्रतापप्रौढीं । तेजें भार्गवा पडे झांपडी । धनुष्य ओढितां कानाडी । चाप कडाडी वैष्णवी ॥५२॥

**श्रीरामांचा प्रताप पाहून परशुरामांना त्यांच्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान :** परशुरामें अति तांतडी । लागवेगें घालोनि उडी । श्रीराम धरिला लवडसवडी । चाप न मोडीं वैष्णवी ॥५३॥ शिवचाप मोडीलें क्षणामाझारी । तैसें वैष्णवचापा न करीं । तुझ्या पराक्रमाची थोरी । चराचरीं अतुल्य ॥५४॥ तुझें बळ अति अद्‌भुत । कळिकाळ तुझे नित्यांकित । तूं अवतार श्रीरघुनाथ । मज निश्चित मानलें ॥५५॥ मी तुझा करूं आलों छळ । तुझे पाहतां स्वभावशीळ । माझी निमाली खळबळ । तू केवळ परमात्मा ॥५६॥ ऐसें बोलोनियां आपण । प्रेमें दिधलें आलिंगन । दोघां जाहलें समाधान । मुळींची खूण पावोनि ॥५७॥

**परस्परांचे अभिनंदन :** श्रीरामें रामा समाधान । श्रीरामें राम सुखसंपन्न । श्रीरामें रामा आनंद पूर्ण । चैतन्यघन श्रीरामें राम ॥५८॥ श्रीरामें रामा अति आल्हाद । श्रीरामें रामा परमानंद । श्रीरामें रामा निजात्मबोध । जाला अभेद रामें रामा ॥५९॥ मी एक राम दाशरथी । हें नाठवे श्रीरामप्रती । मी एक भार्गव भृगुपती । नाठवे चित्तीं परशुरामा ॥६०॥ ऐसें पडिलें आलिंगन । निघोट[2] कोंदलें चैतन्य घन । खुंटला बोल तुटलें मौन । जाले परिपूर्ण पूर्णत्वें ॥६१॥ अवतारकृतकार्यार्थ । साधावया श्रीराम सावचित्त । भार्गवातें श्रीरघुनाथ । उब्दोधित निजबोधें ॥६२॥ तो जवं होय सावधान । सावध करितां रघुनंदन । देखोनि विस्मयसंपूर्ण । शिरोरत्न श्रीराम ॥६३॥ कर्मब्रह्मस्थिति समसमान । श्रीराम अवतार शिरोरत्न । भार्गवे जाणोनि संपूर्ण । सुखसंपूर्ण श्रीरामें ॥६४॥

**सुसज्ज केलेल्या बाणाचा उपयोग :** श्रीराम म्हणे अमोघ बाण । धनुष्यीं करविला आरोपण । तो मागे काढितां नये जाण । कोठें प्रेरण करूं स्वामी ॥६५॥ ऐसें पुसतां रघुनाथ । परशुराम अति विस्मित । बाणाचें लक्ष सावचित्त । विचारितां अनुलक्षी ॥६६॥ श्रीरामाचा निजशर । अतिशयेंसीं अति दुर्धर । तेणें निवटीं माझें गत्यंतर । ऐसें परशुधर सांगत ॥६७॥ श्रीरामाचा निजबाण । जेथें पडे तेथें करी कंदन । येणें निवटावा माझा अभिमान । गमनागमन मग कैंचें ॥६८॥ मी तपस्वी अति श्रेष्ठ । तपें जिंकिले लोक वरिष्ठ । तें लोकांतराची वाट । करीं सपाट येणें बाणें ॥६९॥ मी वीर धीर महाशूर । रणांगणीं अति दुर्धर । शत्रुदलनीं[3] एकांगवीर । हाही अहंकार निर्दाळीं ॥७०॥ माझा निवटल्या अहंकार । कैंचें लोकलोकांतर । सहजें खुंटलें गत्यंतर । हें करी साचार श्रीरामा ॥७१॥ जुंझार बाह्य शत्रू संहारी । श्रीराम निवटी अंतरवैरी । अहंममता जीवें मारी । धनुर्धारी श्रीराम ॥७२॥ श्रीरामाचें अनुसंधान । वीरा शूरां न कळे जाण । शिव चाप धरी आपण । त्यासी संपूर्ण लक्षेना ॥७३॥ अहंकारातें छेदिता । आणिक नाहीं रघुनाथा । येणें बाणें तूं आतां । अहंममता छेदावी ॥७४॥ मी कश्यपास पृथ्वी दिधली दान । तेथें मी वसेन निरभिमान । लोकलोकांतरअभिमान । त्याचें छेदन करीं श्रीरामा ॥७५॥ निरभिमान वसतां क्षितीं । दोष नाहीं गा रघुपती । लोकलोकांतरगती । माझी निश्चितीं निर्दाळीं ॥७६॥ ऐसें बोलिला परशुराम । तेंचि करूं पाहे श्रीराम । कैसें आश्चर्य केलें परम । गत्यंतराचें वर्म श्रीराम छेदी ॥७७॥ अलक्षलक्षोनि श्रीरामचंद्रें । बाण जोडोनि निजनिर्धारें । अर्धमात्रा अर्धचंद्रशरें । अहं रघुवीरें निवटिलें ॥७८॥ जेव्हां गुण वाहिला विष्णुचापासी । तेव्हांचि

शब्दार्थ - १. विष्णूचे धनुष्य, २. घनदाट, ३. शत्रूंचा नाश करण्यात.

बोळवण अहंकारासी । मागुता येईल भार्गवापासीं । तो अर्धमात्रेंसीं निवटिला ॥७९॥ निवटितांचि अहंकार । कैंचें लोकलोकांतर । कैंचें गतिगत्यंतर । केला स्थिर परशुराम ॥८०॥ यापरी श्रीरामचंद्र । सोडोनियां निजशर । सुखी केला परशुधर । स्वर्गादि गत्यंतर खुंटोनी ॥८१॥ कथांतरीं निरूपण । भार्वगाचें स्वर्गगमन । श्रीरामामें खुंटिलें आपण । विंधोनी बाण क्षणमात्रें ॥८२॥ श्रीरामें स्वर्गवाटेसी । काये कूड घातला बाणेंसीं । कां भिंती घातली चौपासीं । स्वर्गगति खुंटली ॥८३॥ ऐसिया पाहतां सूक्ष्म गतीं । तेथींची न कळे अंतर्वृत्ती । बाह्य लौकिक पंडितयुक्ती । रामें स्वर्गगती खुंटविली ॥८४॥ बाणे खुटे स्वर्गगती । हे लौकिक कथावदंती । अहं निवटून रघुपतीं । लोकांतरगती खुंटविली ॥८५॥ ज्यासी अनुलक्षी रामचंद्र । त्याचा गळे अहंकार । सहजें खुंटे गत्यंतर । यापरी रघुवीर स्वर्गगती खुंटी ॥८६॥ श्रीरामें ऐसिया रीतीं । परशुरामाची स्वर्गगती । खुंटविली यथार्थ निश्चितीं । हें ग्रथांर्थीं निजगुह्य ॥८७॥ श्रीरामें जिंतिला परशुधर । गगनीं सुरवरांचा गजर । भूतळीं गर्जती ऋषींश्वर । विजयी रघुवीर निजात्मवीर्यें ॥८८॥ शिवचाप आणि विष्णुचाप । दोहीं चापांचा दुर्धर दर्प । राघवें केला निर्वीर्यरूप । श्रीरामप्रताप निजविजयी ॥८९॥

**परशुरामांचा गर्वपरिहार व क्रोधाचा त्याग :** श्रीरामपरशुरामांचे क्रीडित[1]। ब्रह्मादिदेव विमानांत । कौतुक पाहूं आले समस्त । दोघे अद्भुत महावीर ॥९०॥ ते देव गर्जती अंबरीं । श्रीराम निजविजयी निर्धारीं । वर्षती सुमनांच्या संभारी । ऋषि जयजयकारीं गर्जती ॥९१॥ परशुराम म्हणजे श्रीरघुनाथा । त्वां मज जिंतिलें तत्वतां । हे मज लाज नाहीं सर्वथा । अधिक श्लाघ्यता मज तुझेनि ॥९२॥ जेंवी गूळ गोडी द्विविधा नाम । परी स्वरूपीं नाहीं द्विविध धर्म । तेंवी मी तूं आत्माराम । लज्जा परम कोणाची ॥९३॥ देह लाजेना अवयवा । रूप लाजेना-देहभावा । तेंवी मज तुज राघवा । असेना हेवा लाजेचा ॥९४॥ ऐसें बोलोनि तत्वतां । मग म्हणे गा रघुनाथा । धर्मरक्षण तुझे माथा । लोकपाळण त्वां कीजे ॥९५॥ होता जमदग्नीचा कोप । आणि आपुला निजसाटोप[2] । तो श्रीरामीं केला निक्षेप । जाला सुखरूप परशुराम ॥९६॥ श्रीराम लागला रामचरणां । रामें श्रीरामा केली प्रदक्षिणा । रामनामें गर्जोनि जाणा । गेला स्वस्थाना परशुराम ॥९७॥ श्रीराम विजयी अलोलिक । वसिष्ठासी आल्हाद अधिक । तेणें आलिंगिला रघुकुळटिळक । गेली धुकधुक दशरथाची ॥९८॥ श्रीरामें वसिष्ठासी लोटांगण । दशरथासी साष्टांग नमन । येरे दिधलें आलिंगन । निवालें मन रायाचें ॥९९॥ विजयी जाला श्रीरामचंद्र । ऋषिरायांसी आल्हाद थोर । अवघे करिती जयजयकार । चालिले भार स्वानंदें ॥१००॥ एकाजनार्दना शरण । जाली परशुरामाची बोळवण । आतां अयोध्याप्रवेशन । स्वानंदें गमन श्रीरामा ॥१०१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीराम परशुरामएकात्मबोधनिरूपणं नाम । षड्विंशतितमोध्याय: ॥२६॥ ओंव्या ॥१०१॥ श्लोक ॥१॥

## अध्याय सत्ताविसाता

### श्रीराम-सीतेचा अयोध्याप्रवेश

**श्रीरामांनी विष्णुचाप वरुणास दिले :** श्रीसद्गुरूरामचंद्राय नम: ॥ परशुराम गेला स्वस्थाना । स्वस्थता दशरथाचे मना । आनंद वाढला चौगुणा । रघुनाथ जाणा निजविजयी ॥१॥ सांडोनि वैष्णवचापासी । भार्गव गेला स्वाश्रमासी । धनुष्य दिधलें श्रीरामासी । तेणें वरुणासी तें दिधलें ॥२॥ मी आपुलिया निजात्मशक्तीं । रणीं जिंकोनि राक्षसपंक्ती । वैष्णवचाप हें

शब्दार्थ - १. क्रीडा, युद्ध, २. स्वत:चा अभिमान.

असतां हातीं । लोक म्हणती धनुष्यबळ ॥३॥ माझ्या यशाची निजपुष्टी[1] । अवघी जाईल धनुष्यासाठीं । यालागीं तें उठाउठीं । राम जगजेठी स्वयें त्यागी ॥४॥ स्वसामर्थ्य नाहीं ज्यासी । धनुष्य यश केंवी होईल त्यासी । यालागीं श्रीराम नव्हे अभिलाषी । म्हणोनि वरुणासी दिधलें ॥५॥

अयोध्येत प्रवेश, प्रजाजनांकडून सत्कार : अयोध्ये प्रवेशावया सत्वर । उल्लास करी नृपवर । आनंदें गर्जती गजभार । सैन्यसंभार आल्हादी ॥६॥ निशाण भेरी मृदंग शंख । ढोल चौडकी काहळा अनेक । जयजयकारें सकळिक । नगरान्मुख निघाले ॥७॥ ऋषी पढती शांतिपाठ । ब्रीदें गर्जताती भाट । सिंहनाद करिती वीर वाट । घडघडाट रथांचा ॥८॥ वसिष्ठें दूर धाडिले पुढें । नगर शृंगारावया वाडेंकोडें । रंगमाळा कुंकुमसडे । मखरें तोरणें ठायीं ठायीं ॥९॥ गुढिया उभविल्या घरोघरीं । पताका झळकती अंबरीं । दिव्यभूषणें दिव्यांबरीं । नरनारी शोभती ॥१०॥ कुंकुम केशर सुमनमाळा । कंठीं रत्नपदक रत्नमेखळा । नवरत्नहार रूळे गळां । जनलीला शोभत ॥११॥ पूर्णकलश द्वारोद्वारीं । दधि दूर्वा सुमनें त्यांभीतरीं । प्रदीप्त दीप ठेविले हारीं । घरोघरी आल्हाद ॥१२॥ राजगृहीं अति उत्सावो । गुढिया मखरें उभविती पाहो । विजयी जाला श्रीरामरावो । आजानुबाहो प्रतापी ॥१३॥ श्रीरामें शिवचाप भंगुनी । परशुरामाते जिंकोनी । सीता आणिली पर्णोनी । जनवदनीं हे वार्ता ॥१४॥ एक म्हणती गुरूच्या यागीं । राक्षस मारिले रणरंगी । सुबाहु छेदिला सर्वांगीं । मारीचालागीं घाय केलें ॥१५॥ आणिक म्हणती दुष्ट ताटिका । नित्य पीडीतसे लोकां अनेकां । श्रीरामें देखतांचि देखा । बाणें एका निवटिली ॥१६॥ एक म्हणती श्रीरामें अवलीळा । चरणें उद्धरिली अहल्या शिळा । श्रीराम परब्रह्मपुतळा । सच्चित्कळा साचार ॥१७॥ साकार आणि निराकार । स्वयें श्रीराम चिन्मात्र । धन्य धन्य लोकांचे नेत्र । श्रीरामवक्त्र देखती ॥१८॥ देखतां श्रीरामाचें मुख । नि:शेष जाय तहान भूक । परमानंदे कोंदाटे सुख । हरिखें हरिख ओसंडे ॥१९॥ ऐसी श्रीरामाची कीर्ती । घरोघरीं अनुवादती । आला ऐकोनि रघुपती । सामोरे येती नगरस्थ ॥२०॥ छत्रचामरें गजभारें । वाजती नानाविध तुरें । शोभायमान चारी वोहरें[2] । आला गजरें रघुवीर ॥२१॥ चारी पुत्र चारी सुना । देखतां धणी[3] न पुरे मना । पाहतां पारणें होतसे नयनां । भाग्यभावना दशरथा ॥२२॥ श्रावणपितयाचा शाप । दशरथासी सुखस्वरूप । पुत्र पावला सद्रूप । चित्स्वरूप श्रीराम ॥२३॥ जैसा मातेचा निजकोप । वरी कठिण आंत सुखरूप । तैसा ब्राह्मणाचा शाप । शापें निष्पाप सुख देत ॥२४॥ श्रावणपितयाचिया शापासाठीं । दशरथा श्रीरामभेटी । भोगीत आनंदाच्या कोटी । सभाग्य सृष्टीं दशरथ ॥२५॥

श्रीरामदर्शनार्थ सर्वांची स्पर्धा : नगरीं प्रवेशे रघुपती । चारी मुक्ती पुढे नाचती । पायघडियांचे गतीं । पायीं लोळती पुरुषार्थ ॥२६॥ अनुहताचिया[4] संगतीं । नानाविधें तुरें वाजती । नादें कोंदाटे चिच्छक्ती । नभस्थिती चिन्मात्र ॥२७॥ श्रीराम पहावया प्रेम पडिभरीं[5] । एक चढली परेच्या उपरी । एक चढोनियां गोपुरीं । एक जनांभीतरीं राम पहाती ॥२८॥ एक सलज्ज एकांतीं । गवाक्षद्वारें[6] राम पहाती । एक एकातें धरोनि हातीं । राम दाविती अनुलक्षीं ॥२९॥ हा नव्हे तो नव्हे पैल तो तो । ऐसें देखणे जो दावितो । तोचि अनुभव एका होतो । पाहणें पाहवितो श्रीराम ॥३०॥ एक चढोनि जीवाचे माथां । सादरें पाहाती श्रीरघुनाथा । एक सांडोनि जीवभावता । श्रीरघुनाथा भेटती ॥३१॥ नावडे जीवशिवसांगात । एकाकी एकपणाआंत । परपूर्ण पाहती रघुनाथ । आल्हादयुक्त स्वानंदें ॥३२॥ एक प्रेमाचेनि पडिपाडें । आनंदें नाचती रामापुढें । एक ते अत्यंत निधडे । पाहाती चहूंकडे श्रीराम ॥३३॥ एकातें

शब्दार्थ - १. मोठेपणा, २. वधूवरे, ३. तृप्ती, ४. योगसाधनाने दशनादांचा ऐकू येणारा ध्वनी, त्याच्या संगती, ५. अति प्रेमाने, ६. खिडकीतून.

श्रीराम सांगाती । एकासी श्रीराम नित्यगती । एक श्रीरामाच्या निजस्थितीं । स्वयें वर्तती सर्वदा ।।३४।। एक निःसंग निश्चितीं । लोकाचिये लोकस्थितीं । स्वयें श्रीराम पाहती । आशंकावृत्ति त्यां नाहीं ।।३५।। एकाची नवलनवाई । गजबजेंसीं भिणें नाहीं । श्रीराम पाहती ठायीं ठायीं । आडवें कांही येवों न शके ।।३६।। ऐसिया लोकांचिया पंक्ती । श्रीरामासी पाहूं येती । मंडपघसणी[1] जनासी होती । श्रीराममूर्ती पहावया ।।३७।। पायघड्या पदवाहणें । दीपावळी नीरांजनें । ओवाळिती धनधान्यें । राम पहावया उल्लास जनासी ।।३८।। श्रीराम जातां निजनगरीं । पाहों न येती अग्निहोत्री । पाहतां विटाळ होईल भारी । तंव राम दुरी अंतरला ।।३९।। श्रोत्री स्वयंपाकी केवळ । श्रीराम पाहतां होय विटाळ । आधणीं टाकावया तांदूळ । चाटू[2] तत्काळ विसरले ।।४०।। ऐशिया विटाळाची परी । श्रीराम अंतरला दुरीच्या दुरी । धुपधुपित पाकाभीतरीं । कर्मअहंकारीं गुंतले ।।४१।। आम्ही उत्तम आश्रमवासी । श्रीराम जातो जनप्रदेशीं । पाहतां स्पर्श होईल आम्हांसी । दुरून संन्यासी पाहूं म्हणती ।।४२।। विटाळाभेणें दुरूनि पाहतां । श्रीराम न दिसे सर्वथा । आश्रमाभिमाने पाहूं जातां । राम तत्वतां लक्षेना ।।४३।। अनुलक्षोनि श्रीरामासी । पिंगळा वेश्या धांवे उल्लासीं । मार्गीं झगटली संन्याशासी । हें लक्ष तिसी असेना ।।४४।। मज कां झगटली हे रांड । रागें संन्यासी ठोकी दंड । येरी पाहतां श्रीरामाचें तोंड । दंडें उदंड सुखी जाली ।।४५।। स्वामी तुमच्या दंडाचा घाव । तेणें दंडिला माझा अहंभाव । तों दंडीना तुम्हांसी पाहाहो । पाहतां रामराव विटाळ देखा ।।४६।। श्रीराम पाहतां विटाळ उडे । तो विटाळ संन्याशामाजी दडे । म्हणोनि विटाळाचें सांकडें । संन्याशाकडे सर्वदा ।।४७।। श्रीराम पाहतां विकल्पविटाळ । भक्तभावीं न राहे तीळ । तो सद्वंध संन्याशामाजी सळ[3] । आश्रमीं केवळ राहिला ।।४८।। मी आत्मा सर्वांभूतीं परिपूर्ण । ऐसें भूतां देवोनि अभयदान । स्वयें केलें संन्यासग्रहण । तोचि आपण विटाळ देखे ।।४९।। श्रोत्री स्वयंपाकी संन्यासी । हे निजमाहेर विटाळासी । त्यांमाजी तो सदा मुसमुसी । देखती जगासी अपवित्र ।।५०।। ऐसी विवादतां वेश्या संन्याशासीं । श्रीराम गेला स्वयें स्वाश्रमासी । संन्यासी करितां मृत्तिकास्नानसी । आली हातासी मृत्तिका ।।५१।। मी पवित्र जग अपवित्र । हें स्वयंपाकाचें मुख्य सूत्र । तेणें विटाळे श्रीरामचंद्र । दुरी दूरतर अंतरला ।।५२।। वर्णाभिमान स्वाश्रमाभिमान । कर्माभिमान धर्माभिमान । न[4] वंचितां[4] सर्वाभिमान । रघुनंदन भेटेना ।।५३।। वेश्या बोलतां सद्युक्तीसी । पिंगळा वेश्या कोण म्हणसी । जे अवधूतें[5] चोविसां गुरुंसी । यदूपासीं सांगितली ।।५४।। श्रीराम पावला राजभवन । शांति येवोनि आपण । जीवभावाचें निंबलोण । सांडी ओवाळून वोहरांसी ।।५५।।

श्रीरामाचे राजप्रासादात आगमन : चारी पुत्र सुना चारी । वसिष्ठे धरोनियां करीं । प्रवेशला राज मंदिरीं । उल्लास भारी राणिवसां[6] ।।५६।। वाजती मधुर मंगळतुरें । द्विज गर्जती जयजयकारें । वोहरें देखोनि मनोहरें । राण्या आदरें पाहों आल्या ।।५७।। पहिलें कौसल्येसी नमन । चारी सुना अंकी वाहून । फरा[7] कंकण पदकभूषण । दे आपण स्वानंदें ।।५८।। लागतां सुमित्रेच्या चरणां । अति हरिखें आलिंगी चारी सुन । कटिमेखळा करकंकणा । दे आपण स्वानंदें ।।५९।। कैकयीसी करतां नमन । चहूं सुनांसी दे चुंबन । त्यांत आपुल्या दोघी सुना जाण । त्यांसी घाली आपण सुमनमाळा ।।६०।। आणखी राणिवसांच्या नारी । वोहरें आलिंगती प्रीतीकरीं । ओवाळिती नानापरी । आल्हाद भारी राणिवसां ।।६१।। करावया गृहप्रवेशासी । कृत्रिम लक्ष्मी भाणवसीं । देखोनि श्रीरामसामर्थ्यासी । लक्ष्मीं पूर्णाशेसीं प्रकटली तेथें ।।६२।।

शब्दार्थ – १. सभामंडपात भयंकर गर्दी होऊन गेली, २. चघळपणा करणारे, ३. अभिमान, ४. न टाकता, ५. दत्तात्रेयाने, ६. जनानखान्यात, ७. बाहुभूषण.

कृत्रिम लक्ष्मीचें अंतर । तेथें प्रवेशली लक्ष्मी साचार । तिणें तिचें रूप मनोहर । अति सुंदर आभासे[1] ॥६३॥ सीता आणिली धनुर्भंगेंसीं । दुसरी सीता कैंची भाणवसीं[2] । हें आश्चर्य ज्यात्यासीं । ऋषिही मनासीं विस्मित ॥६४॥ ते देखतां लक्ष्मीयेसी । सीता साशंकित मानसीं । हे स्त्री असतां गृहवासी । रामे कां मज सीतेसी पर्णिले ॥६५॥ आम्ही दोघी स्त्रिया असतां । केंवी एकपत्नीत्व रघुनाथा । असो ते एकपत्नीत्वकथा । सवती तत्वतां मज जाली ॥६६॥ सवती ओढवली कपाळासी । म्हणोनि क्षोभें पाहतां तिसी । लक्ष्मी लागली पायांसी । मी तुझी दासी जानकीये ॥६७॥ प्रेमें देतां आलिंगन । दोहींचें मोडलें दोनपण । दोहीं ठायीं एकत्व पूर्ण । आपणा आपण देखती ॥६८॥ लक्ष्मी तेचि सीता आपण । सीता तेचि लक्ष्मी जाण । श्रीरामाचें एकपत्नीपण । सीतेसी पूर्ण कळो सरलें ॥६९॥ सीतालक्ष्मीचें एकपण । त्या दोघी जाणती आपण । हें ब्रह्मादिकां न कळे विंदान[3] । कीं जाणे पूर्ण वसिष्ठ ॥७०॥

लक्ष्मीपूजन, आपल्या पत्नीसह चारही बंधू दशरथ व वसिष्ठाचे सेवेस तत्पर : तेणें वसिष्ठें आपण । केलें लक्ष्मीचें पूजन । गृहप्रवेशाचें विधान । केलें संपूर्ण यथोक्त ॥७१॥ शुद्ध विद्या जोडली शस्त्रास्त्रीं । स्त्रिया आणिल्या अति गजरीं । कीर्ति फार जाली लोकांतरीं । येवढी सामग्री श्रीरामा ॥७२॥ तेही चौघे बंधु चौघी स्त्रियांसी । दशरथाचे सेवेंसीं । सावधान अहर्निशीं । वसिष्ठापासीं किंकरत्वें ॥७३॥ त्यांमाजी श्रीराम जाण । वसिष्ठासी प्रिय संपूर्ण । तो दशरथाचा जीवप्राण । आवडे संपूर्ण सर्वांसी ॥७४॥ राम आवडे सर्व भूतां । रामें सर्वांसी सुखरूपता । तोही वसिष्ठाच्या वचनार्था । होय वंदता किंकरत्वें ॥७५॥ गुरुमहिमा अति थोर । तो संरक्षी रामचंद्र । लोकसंग्रहणार्थ साचार । दावी विचार भजनाचा ॥७६॥

श्रीराम-सीता यांचे परस्पर प्रेम : श्रीरामाच्या मनोगता । अनुकूल वर्ते सीता । सीतेचिया मनोरथा । परिपूर्णता श्रीरामें ॥७७॥ सीतेचा भाव श्रीरामी पूर्ण । राम सीतेसीं संपूर्ण । सीता रामें सुखसंपन्न । सुखी रघुनंदन सीतेचेनि ॥७८॥ रामरसें रसज्ञ सीता । सीतेच्या रसने श्रीराम भोक्ता । श्रीराम देखणें सीता डोळसता । तिचेनि देखता श्रीराम ॥७९॥ श्रीरामें सीता सुंदर पूर्ण । सीतेने राम शोभे सगुण । श्रीरामें सीता सुलक्षण । सीतेचेनि लक्ष्यलक्षण श्रीरामा ॥८०॥ श्रीराम सीतेचा निजभोग । सीतेचेनि श्रीराम सुरंग । श्रीरामें सीता शोभे सांग । सीता सर्वांग श्रीराम ॥८१॥ सीता रस श्रीराम स्वाद । सीता सुमन श्रीराम सुगंध । सीता बुद्धि श्रीराम बोध । अनन्यसिद्धि येरयेरां ॥८२॥ सीतावचन श्रीराम वचनार्थ । सीता पद श्रीराम पदार्थ । सीता मुक्ति श्रीराम मुक्त्यर्थ । परम स्वार्थ येरयेरां ॥८३॥ सीता जीव राम जीवन । सीता मन राम मनोज्ञ । सीता चित्त श्रीराम चैतन्य । आनंदघन येरयेरां ॥८४॥ सीता धरा श्रीराम धारक । सीता चाळण श्रीराम चाळक । सीता व्याप्य श्रीराम व्यापक । सुखसंतोष येरयेरां ॥८५॥ सीता क्रिया राम कर्ता । सीता भोग्य राम भोक्ता । सीता ज्ञान राम ज्ञाता । एकात्मता अतिप्रीतीं ॥८६॥ सीता शर्करा राम गोडी । सीता व्यवसाय राम जोडी । एकात्मता अति आवडीं । न कळे फुडी[4] श्रुतिशास्त्रां ॥८७॥ येरयेरांविण जाण । न करिती उदकपान । येरयेरांविण न खाती पान । प्रीति अनन्य येरयेरां ॥८८॥ येरयेरां वेगळेपण । होऊं न शकती अर्धक्षण । अणुमाजी दोघे जण । नांदती पूर्ण पूर्णत्वें ॥८९॥ ऐसीऐसिया अनन्यगतीं[5] । श्रीराम भोगी सीता सती । सीतेचिया निजात्मप्रीतीं । श्रीराममूर्ति उल्लासे ॥९०॥ सीतेचा भावार्थ संपूर्ण । देखोनि उल्लासे रघुनंदन । सीता भाव धरी द्विगुण । प्रति चतुर्गुण श्रीरामीं ॥९१॥ सीता भाव धरी अधिकाधिक । तंव तंव श्रीरामीं ओसंडे सुख । कैसी अति प्रीति

---

शब्दार्थ - १. शोभे, २. अंतर्गृहात, ३. चमत्कार, ४. खरेपणाने, ५. एकात्मतेने.

अलोलिक । एकएकां अनन्य ॥९२॥ जैसा ज्यासी श्रीरामीं भक्ती । तैसी त्यावरी रामप्रीती । हें बोलिलेंसे बहुतां ग्रंथीं । मीच किती अनुवादों ॥९३॥ जैसा भाव तैसी प्रीती । जैसी प्रीती तैसी प्राप्ती । जैसी प्राप्ति तैसी स्थिती । हाचि परमार्थी मुख्यार्थ ॥९४॥ ग्रंथीं राखोनियां गुह्यार्थ । मुख्यत्वें दावावा परमार्थ । हाचि कवित्वाचा निजस्वार्थ येणें । रघुनाथ संतुष्ट ॥९५॥

बालकांडाचा उपसंहार : संतुष्ट होती श्रोते । संतुष्ट होती वक्ते । संतुष्ट होती कथाकर्ते । श्रीरामचरित्र रामायण ॥९६॥ कथा परिसतां रामायण । पूर्वज उद्धरती जाण । पूर्वजांचें नवलाव कोण । उद्धरे संपूर्ण त्रिजगती ॥९७॥ श्रीरामकथेची नव्हाळी[1] । हे सदाशिवाची जपमाळी । मणिकर्णिका अंतकाळीं । जपे कर्णमूळीं तें हें ब्रह्म ॥९८॥ सावधान करणें निजमना । तेचि मणिकर्णिका सत्य जाणा । आदरें परिसतां रामायणा । तें तारक पूर्ण परब्रह्म ॥९९॥ आदरें रामकथाश्रवण । तें तारक ब्रह्म रामायण । काशी मणिकर्णिका आपण । हात जोडून उभ्या तेथें ॥१००॥ यालागीं रामकथेपासीं । तीर्थें तिष्ठती अहर्निशीं । चारी मुक्ति होती दासी । कथाउल्हासीं परमानंद ॥१॥ कथा रामायणी अगाध । पदोपदीं परमानंदे । श्रवणें ओसंडे आनंद । निजात्मबोध श्रीरामें ॥२॥ रामायणाच्या निजकीर्ती । सुखें शिवादिक डुल्लती । तेणें पावन त्रिजगती । कथाश्रवणार्थी श्रीराम संतोषे ॥३॥ यापरी अयोध्येप्रती । सीतेचे अनन्य प्रीतीं । वसता झाला रघुपती । जाली समाप्ती बाळकांडा ॥४॥ वश्य करोनि वैराग्य वितंड[2] । साधिलें ब्रह्मज्ञान अखंड । ऐक्या आणोनि पिंडब्रह्मांड[3] । बाळकांड संपविलें ॥५॥ साधिली शस्त्रास्त्रविद्या उदंड । गुरुयाग सिद्धी नेला प्रचंड । झाडोनि अहल्यापापबंड । बाळकांड संपविलें ॥६॥ ताटिका सुबाहु केलीं दुखंड । राजे लाजवूनी उदंड । मारीचाचें ठेंचोनि तोंड । बाळकांड संपविलें ॥७॥ भंगोनि शिवाचें कोदंड । सीतासंशया देवोनि दंड । अहंरावणाचें काळें तोंड । करूनि बाळकांड संपविलें ॥८॥ परशुरामप्रताप प्रचंड । तो करोनि खंडविखंड । विष्णुचापाचें दमूनि बंड । बाळकांड संपविलें ॥९॥ यापरी संपलें बाळकांड । पुढें रामप्रताप प्रचंड । राक्षस वधिजेतील वितंड । तें कांडे कांड अवधारा ॥११०॥ एकाजनार्दना शरण । कथा रम्य रामायण । जालें बाळकांड संपूर्ण । कृपा पूर्ण संतांची ॥११॥ संतकृपा परिपूर्ण । अगाध कथा रामायण । तें मी वदावया अति दीन । श्रीजनार्दन स्वयें वदवी ॥१२॥ स्वयें श्रीरामचि ग्रंथ कथिता । श्रीरामचि ग्रंथकर्ता । श्रीराम ग्रंथ लिहविता । वदनीं वदविता श्रीराम ॥१३॥ एकाजनार्दना शरण । यापरी श्रीराम आपण । कथा करवी रामायण । केलें संपूर्ण बालकांड ॥१४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे बालकांडे एकाकारटीकायां श्रीरामजानकीअयोध्याप्रवेशो नाम सप्तविंशतितमोध्याय: ॥२७॥ ओंव्या ॥११४॥

## बालकांड समाप्तम्

---

शब्दार्थ - १. नवल, चमत्कार, २. कडकडीत, ३. स्थावरजंगमात्मक सर्व सृष्टी.

श्रीसद्‌गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

# अयोध्याकांड

## अध्याय पहिला

### श्रीरामलक्ष्मणांच्या शस्त्रास्त्रविद्यानैपुण्याचे प्रदर्शन

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

गजाननाय महते प्रत्यूहतिमिरच्छिदे । अपारकरुणामूर्त्यै सर्वज्ञानदृशे नमः ॥१॥
चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् । एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥२॥

रामायणाचे रूपक : श्रीरामकथेची नव्हाळी । शेष वंदी पाताळीं । शिव वंदी प्रेमसमेळीं[1] । कथा भूतळीं जगद्वंद्य ॥१॥ तरी ते शतकोटी रामायण । आळवूं[2] शकेल[2] कोण । तेथें मी अपुरतें दीन । परी तो जनार्दन स्वयें वदवी ॥२॥ तरी श्रीरामस्वरूप चिद्रूपता । चैतन्यशोभांकित सीता । तरी देवक्तांच्या कृतकार्यार्था । मानुष्यजाड्यता[3] अवतारू ॥३॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तेचि नारी । तेंवी ते सीता निर्धारी । एकात्मतेवरी स्त्रीपुरुष ॥४॥ जैसीं बहुरूपी रावराणी । परी स्त्रीपुरुषभाव नाहीं मनी । तरी तेचि संपादणी । लोकसंरक्षणीं सत्यत्वें दावी ॥५॥ 'एकाकी न रमते' या श्रुती । सवतीमत्सरू स्वयें म्हणती । तरी हे बृहदारण्यवेदोक्ती । द्वैतीं कल्पिती अद्वैतभावो ॥६॥ परब्रह्म जें अतिरिक्त । 'सहैतावानास' द्विधांग पावत । तरी हा वेदांतींचा इत्यर्थ । द्वैत कल्पित अद्वैतत्वें ॥७॥ यापरी सुखें श्रीरामसीता । दोनी नांदती एकात्मता । ऐसिया स्थितीची व्यवस्था । जे अवतारता नटनाट्यें ॥८॥ तरी व्यवस्था । पावे

शब्दार्थ - १. मोठ्या प्रेमाने, २. वर्णू शकेल, ३. जड मानवदेह धारण करून.

अधिकारविधी । आणि भक्तां नांदवावें निजपदीं । म्हणोनि याचिलागीं त्रिशुद्धी । अवतार सिद्धि श्रीराम ॥९॥ ऊंस गाळून काढिजे रस । मग तोही जाळून असोस । शर्करा कीजे अति सुरस । तिचाही निर्मळांश नाबद[1] कीजे ॥१०॥ मग नाबदेचीं अति निगुतीं । फळें नारळें चतुर करिती । आणि तेथेंही कवटें काढिती । ते करंटे निश्चितीं निजस्वादा ॥११॥ तेंवी परब्रह्मतेचि रसें । देहाकृतीचिये मुसें । ओतींव रामरूपाचे ठसे । आले आपैसे चित्स्वरूपा ॥१२॥ ऐसी रामाची शुद्धमूर्ती । शोभा शोभवी त्रिजगती । तरी तेथें स्थूलत्व भाविती । ते करंटे निश्चितीं अभागी ॥१३॥ जे मनुष्य मानिती श्रीरामा । ज्याचेनि नामें नाश भवभ्रमा । त्यासी मानवी महिमा । बोलोंचि नये ॥१४॥ श्रीरामाची निजस्थिती । शिवभवानी नाम जपती । आणि त्यासी लक्ष्मण अनुवर्ती[2] । सखा सांगाती सर्वस्वें ॥१५॥

**व्यूहचतुष्ट्यांचे वर्णन :** तरी लक्ष्मण एकात्मता रामांकित । केवळ भावार्थ तो भरत । शत्रुघ्न तो धैर्यवंत । हा व्यूहवृत्तांत[3] चतुष्टयाचा ॥१६॥ मुख्य मुळीं एक मूर्तीं । तेचि चतुर्धा[4] अभिव्यक्ती । या नांव व्यूहचतुष्टय म्हणती । एक निश्चिती विभाग ॥१७॥ आत्मप्रबोध तो लक्ष्मण । भावार्थ तो भरत जाण । निजनिर्धारी तो शत्रुघ्न । आनंदेंविग्रही पूर्ण श्रीराम ॥१८॥ अहमात्मा तोचि दशरथ । उत्पत्तीसी मुख्य हेत । दूर गेलिया श्रीरघुनाथ । निवर्तत अहमात्मा ॥१९॥ आतां विवेक आणि निजविचारू । तैसे वसिष्ठविश्वामित्र गुरू । ज्यांपासोनि अति साचारू । शस्त्रास्त्रविद्या दृढ केली ॥२०॥ कौसल्या ते सुविद्या । सुमित्रा ते शुद्ध मेधा[5] । कैकयी ते अति अविद्या[6] । मंथरा कुविद्या तीपासीं ॥२१॥ कुविद्या क्षोभवोनि अविद्येसीं । श्रीराम केला वनवासी । तंव सीता अनन्यभावेंसी । श्रीरामासरसी निघाली ॥२२॥ सूर्या संव जैसी प्रभा । वसंतासवें शोभे वनशोभा । तेंवी जानकी जगदंबा । प्राणवल्लभासवें निघे ॥२३॥ जेंवी साकरेतें न सांडी गोडी । तेंवी सीता रामा न सोडी । केवळ सेवेची आवडी । वनीं रोकडी दासत्वाची ॥२४॥ राज्यीं असतां रघुनंदनासी । सेवा वांटिली सेवकांसी । तरी ते मी एकली वनवासीं । सर्व सेवेसी पात्र होईन ॥२५॥ श्रीरामसेवा जरी ये हाता । ऐसें भाग्य दुर्लभ सर्वथा । ते सेवावया तत्वतां । चरणचालीं सीता वना आली ॥२६॥ ऐसी हे सीतेची गती । तैसीच लक्ष्मणाची स्थिती । श्रीरामसेवे वनाप्रती । आला निश्चितीं सर्वभावें ॥२७॥ जैसा आत्म्यापासीं निजबोधु । तैसा श्रीरामासवे निजबंधु । दोघांचा एक संवादु । परम आल्हादु वनवासीं ॥२८॥ जैसे बोध विरक्ति परमार्थासीं । तैसे सीता लक्ष्मण श्रीरामासीं । ऐसे तिघे निघाले वनवासीं । कृतकार्यासी लक्षोनी ॥२९॥ लक्षोनि पुढील कार्यार्थ । वना निघाला श्रीरघुनाथ । येथोनि चालिला ग्रंथार्थ । तो श्रोतीं भावार्थ अवधारिजे ॥३०॥ रामायणींचा ग्रंथार्थ । त्यामाजी जो निजभावार्थ । श्रोतीं पाहावा सावधानार्थ । अर्थे परमार्थ सहज जोडे ॥३१॥ एकाजनार्दना शरण । हें भावार्थरामायण । श्रीरामाचें निरूपण । दावी लक्षण व्यूहचुष्टयाचें ॥३२॥

**श्रीरामकथा पठणश्रवणाचे फळ :** श्रीरामकथेचें अक्षर । तें क्षराक्षरातीत[7] पर । सभाग्य भाग्याचे जे नर । ते कथा सादर परिसिती ॥३३॥ कथाश्रवणें उपजे विरक्ती । कथाश्रवणें वाढे शांती । कथाश्रवणे परमानंदप्राप्ती । महापापी उद्धरती कथाश्रवणें ॥३४॥ चोरटा वाल्मीक महापापी । तो रामनामें जाला निष्पापी । त्याची कथा नित्य जपी । कथा वाग्जल्पीं[8] शिवाच्या ॥३५॥ तें हे शिवसेव्य रामायण । श्रवणें मरणासी ये मरण । सर्वेचि जन्मा ये बोळवण । श्रवणें परिपूर्ण ब्रह्मप्राप्ती ॥३६॥ नित्य जपतां रामनाम । वक्ता होय पूर्ण ब्रह्म । त्याचिया कथेचा

---

शब्दार्थ – १. खडीसाखर, २. संगती राहाणारा, ३. मथितार्थ, ४. चार प्रकारांनी, ५. धारणाशक्ती, बुद्धी, ६. अज्ञान, ७. विनाशी व अविनाशी या पलीकडील, ८. भाषणामध्ये.

अनुक्रम । कर्माकर्मा छेदक ॥३७॥ कथा निर्दळी कर्माकर्म । श्रोते स्वयें होती परब्रह्म । वाल्मीकाचा उपकार परम । केला सुगम परमार्थ ॥३८॥ सुगम परमार्थ रामकथा । बाळकांड स्वयें संपतां । विजयगजरें श्रीरघुनाथा । अयोध्ये आंतौता[१] आणिला रायें ॥३९॥ ते अयोध्येआंतौता[१] दशरथ । सुखें स्वानंदें नांदत । नित्य सेवा करी रघुनाथ । हर्षयुक्त बंधूंसी ॥४०॥

भरताचे मामाच्या घरी जाणे : मातुळकुळीं न्यावया भरत । मातुळ जो कां युधाजित । तो रायासी साक्षेपयुक्त[२] । असे पुसत एकांतीं ॥४१॥ भरताचें मनोगत । मातुळगृहा जावया उद्यत । तें जाणोनियां दशरथ । स्वयें धाडित उल्हासें ॥४२॥ अश्व गज रथ पदाती । चतुरंग सेना सहसंपत्ती । भरतशत्रुघ्न मातुलाप्रती । धाडी नृपती निजगजरें ॥४३॥ दोघे जावोनि उल्लासीं । भेटले कैकेयीसुत मातामहासी । वेगीं नमोनि मातामहीसी । मातुळवासी स्वानंदें ॥४४॥ नित्य नवे नाना भोग । कौतुकसोहळे उपभोग । दोघे वसती अनुद्वेग[३] । वैभवभाग्य-उल्लासें ॥४५॥

दशरथाच्या इच्छेनुसार कुलगुरूंनी शस्त्रास्त्रविद्येतील नैपुण्याचे केलेले प्रदर्शन : येरीकडे अयोध्येसीं । वसिष्ठाचे निजसेवेसी रामसौमित्र अति उल्लासीं । सर्वस्वेंसीं सादर ॥४६॥ तैसेंचि दशरथसेवेसी । निकटवर्ती अहर्निशीं । जें जे मनोगत रायासी । त्या त्या कार्यासी प्रवीण ॥४७॥ न सांगतां मनोगत । हृदयींचा निजकार्यार्थ । तो तो संपादी रघुनाथ । अति समर्थ मनोज्ञ ॥४८॥ रायाचा अति पढियंता[४] । वसिष्ठाचा आवडता । राम आवडे समस्तां । भूतमहाभूतां वल्लभू ॥४९॥ जैसें जीवन कां जीवासी । तैसा श्रीराम सर्वांसी । अखंडता अहर्निशीं । जीवोल्हासी श्रीराम ॥५०॥ जैसा चंद्रकर चकोरां । तैसा श्रीराम चराचरां । आवडे सर्व नारीनरां । जीवां समग्रां अति प्रिय ॥५१॥ वसिष्ठ सांगे रायापासीं । राम शस्त्रास्त्रविद्याराशी । तेंचि पहावया रायासी । निजमानसीं उल्लास ॥५२॥ जाणोनि रायाचें मनोगत । वसिष्ठ आज्ञापी श्रीरघुनाथ । विद्या पाहूं इच्छी दशरथ । आज्ञा समर्थ राम म्हणे ॥५३॥ गुरूवचन पितृवचन । साधुसज्जनआज्ञापन । उल्लंघी तो अभागी पूर्ण । तो पाषाण नरदेही ॥५४॥ गुरुआज्ञेचें उत्तर । ऐकतां करावें सत्वर । मुहूर्त पाहे तो पामर। करी विचार तो मूर्ख ॥५५॥ मी तंव केवळ आज्ञाधार । ऐसें बोलिला रघुवीर । कांस घातली सत्वर । आला सौमित्रासन्निध ॥५६॥ गुरुआज्ञेचें विंदान । दोहीं बाह्यांस आलें स्फुरण । अंगीं न समाये सत्राण[५] । प्रतापपूर्ण गुरुवाक्यें ॥५७॥ गुरुवाक्याचा उल्लासु । ज्या नाहीं तो केवळ पशु । शिष्यांमाजी तो रासभवेषु[६] । ज्यासी आळस गुरुवाक्यां ॥५८॥ देखोनि साटोप[७] रघुवीरू । वसिष्ठासी उल्लास थोरू । जेंवी देखोनि पूर्ण चंद्रू । क्षीरसमुद्रू हेलावें[८] ॥५९॥ तैसें जालें वसिष्ठासी । थोर आल्हाद दशरथासी । देखोनि साटोप पुत्रासी । रंगभूमीसी श्रृंगारी ॥६०॥ रायें रंग[९] श्रृंगारिला । देखोनि विश्वकर्मा शंकला । स्वर्ग तेणें फिका केला । लाजविला कैलासु ॥६१॥ अलकावतीची सौभाग्यथोरी । रंगी नसरे[१०] लोणावरी । तसिया रंगामाझारी । रंगधारी श्रीराम ॥६२॥ धनुर्विद्या अलक्षविद्या । छत्तीस दंडायुधविद्या । संमुखीविमुखीकरणविद्या । मल्लविद्या लघुविद्या लाघवी ॥६३॥ गजवाजिरथारोहण । निराधारीं युद्धकरण । आकाश खोंचोनि परतें जाण । मेरू अडवणें तृणप्राय ॥६४॥ ऐसिया विद्या अलोलिक । गुरुआज्ञें दावी आवश्यक । पाहूं आले नागरिक । साधु लोक ठेंसलें[११] ॥६५॥ रंगी उभा रघुवीर । विद्या दावी समग्र । पाहूं आले सुरवर । विमानीं

---

शब्दार्थ - १. अयोध्येमध्ये, २. आग्रहाने, ३. दुःखरहित, ४. आवडता, प्रिय, ५. बळ, ६. गाढवरूप धारण करणारा, ७. उद्योगी, उत्साही, ८. उचंबळून येतो. ९. सभामंडप, १०. हीन होते, ११. भरेल.

अंबर दाटलें ।।६६।। ते काळीं रामलक्ष्मण । धनुर्विद्येचे लक्षण । वीरश्रयेची आगवण । स्वयें संपूर्ण दाविती ।।६७।। देखोनि श्रीरामाचें ठाण । सुरासुर कंपायमान । नरांचे झांकोळले नयन । देदीप्यमान तेजस्वी ।।६८।। बाणतेजें छेदी गगन । गगनोदरींची अलक्ष खूण । स्वयें लक्षूं जाणे आपण । अचुक संधान श्रीरामाचें ।।६९।। बाणपिसारियाचा वारा । शत्रूसहित CSa r ahS am[1] । गगनीं भोवंडी गरगरां । जेंवी तृणांकुरां वाहटुळी ।।७०।। श्रीरामबाणाचा प्रताप । मेरूमांदारां चळकांप । भेणें सहस्रमुखा लागे धाप । कूर्म साटोप तडतडों लागे ।।७१।। त्या सिंहनादाचा अति गजर। तेणें शत्रुचें भेदे जिव्हार । परदळीं हाहाकार । वीर धीर मूर्च्छित ।।७२।। परशु पट्टिश तोमर । गदा मुद्गर लहुडी चक्र । या शस्त्रांचा महामार । दावी अनुकार शत्रुदमनीं ।।७३।। असि पाश शूळ शक्तिधर । छत्तीस दंडायुधचमत्कार । दावी शस्त्रांचे महामार । शत्रुसंभारनिर्दळणीं ।।७४।। वोढण खर्गाचा धारकु । दावी थरक सरकु । वोढण धडके लावोनि धाकु । पाडी एकैकु मूर्च्छित ।।७५।। पुढील वेगाचेनि उड्डाणें । शत्रुसमुदावो मर्दणें । तेचि पाठिमोरे किराणें[2] । निर्दळणें अरिवीरां ।।७६।। पुडिल्या घायीं मागिल्या पाडी । मागिल्या घायीं पुढील तोडी । ऐसिया माराच्या परवडी[3] । रणीं निर्वडीं[4] दावितु ।।७७।। निर्वाणयुद्धाचा निर्वाहो । मागीलपुढिल्या एकचि घावो । तो तो यावा[5] दावित पहाहो । ऋषि आणि रावो विस्मित।।७८।। जाणे मल्लविद्याकुसरी । उरीं शिरीं हाणी कोंपरीं । तळील आणोनियां वरी । चक्राकारीं उपडितु ।।७९।। अष्टांगींच्या कळा जाणे । कळा लावोनि प्राण घेणें । एकांगुष्ठाचेनि चेपणें । जीवें मारणें महावीर ।।८०।। तडवा[6] हाणोनि तांतडीं । गजेंसहित वीर पाडी । रथ मोडोनि कडाडीं । रण रगडी पायवाटा ।।८१।। जाणें रथीं आरोहणें । रणीं माराचें प्रेरणें । गति विगति परिभ्रमणें । चक्रावर्तन रथाचें ।।८२।। रथाचिया सवेगता । शत्रुरथ अपसव्यता । घालोनि चालवी निजरथा । रथयोग्यता दावितु ।।८३।। निरालंबीचिया गमना । रथ चालवूं शके जाणा । दावितां रथगतिलक्षणा । विस्मयों मना सुरसिद्धां ।।८४।। गज गर्जोनि आलियावरी । उडोन बैसे कुंभांतरीं[7] । मग वागवी युद्धाचारी । महामारी गजयोद्धा ।।८५।। गजें परसैन्य आकळी[8] । गज रगडी गजातळीं । गजें गजदळ निर्दळी । रणरांगोळी गजयोद्धा ।।८६।। बैसों जाणे अश्वावरी । वागवी युद्धाच्या महामारी । नाचवी चौं पायांवरी । रणांगणीं विचरतु ।।८७।। अश्वखुरांचे महारजें । वैरी पावती निर्बुजें[9] । शस्त्रें विसरती गजबजें । वारु रघुराजें प्रेरितां ।।८८।। लागतां अश्वांची महाझड । सैन्य होय जी दुखंड । तोडित वीरांचें रुंडमुंड । वैरी दुखंड रणरंगीं ।।८९।। ऐसे नाना अनुकार । अश्वगजरथांचे संचार । शस्त्रास्त्रांचें महामार । दावी चमत्कार रघुनाथ ।।९०।। युद्धादियावा अनुकरण । श्रीरामाचा अतिदारुण । देखोनि एक मूर्च्छापन्न । एक ते प्राण सांडूं पाहती ।।९१।। एकीं घेतलें परम धाका। एकासी लागला धुकधुका । एक करिती लघुशंका । एक देखा नागवे पडती।।९२।। देखोनि श्रीरामाचा प्रताप । सुरसिद्धां सुटे कांप । दैत्यदानवां अहा कंप । दुर्धररूप श्रीराम ।।९३।। भूतभविष्य वर्तमान । जाणते जे सज्ञान । तेंही धाकें कंपायमान । यावा दारुण देखोनी ।।९४।। श्रीरामयावा अति दुर्धर । देखोनि राजा सुखनिर्भर । विद्यानिपुण जाले कुमर । हा दृढ निर्धार रासायी ।।९५।। राजा अत्यंत हर्षनिर्भर । ओंवाळी वस्तुजात[10] अपार । सुरवर करिती जयजयकार । सुमन संभार वर्षले ।।९६।। देखोनियां दुर्धर

---

शब्दार्थ - १. रथाला, २. उड्डाणानें, ३. प्रकार, ४. कौशल्याने, ५. पराक्रम, ६. तडाका, फटका मारून, ७. गंडस्थलावर, ८. दणाणून सोडी, ९. भयभीत होतात, १०. अनेक वस्तू.

यावा । हर्ष वसिष्ठाचिया जीवा । आनंदें आलिंगी राघवा । प्रेम सद्भावे आल्हादे ॥९७॥ शस्त्रास्त्रविद्येचा साटोप[1]। तुवां दाविला सद्रूप। धन्य धन्य विजयाचा प्रताप । कृपा सकृप तुष्टला ॥९८॥ माझ्या वरदाचे द्विपंच[2]बाण । यत्नें राखा दोघे जण । युद्ध मांडिलिया निर्वाण[3]। जय संपूर्ण इहीं बाणीं ॥९९॥ याचिया बाणांच्या पैं पोटीं । शस्त्रास्त्रें कोट्यनुकोटी । सुटोनि शत्रुसमुद्र आटी । हे गुह्य गोष्टी सांगितली ॥१००॥ यापरी अपत्यत्वें सन्मान । दोघां देवोनि आश्वासन । निजगजरें अवघे जण । राजभवन प्रवेशले ॥१॥ श्रीराम सर्वगुणीं संपन्न । हे रायासी कळलें लक्षण । तेंचि वसिष्ठासी आपण । गुह्य संपूर्ण पूसतु ॥२॥ राज्यीं अभिषेकाचा रघुनाथ । हा दृढ माझा मनोरथ । स्वामीनें सांगावा इत्यर्थ । तोच कार्यार्थ मी करीन ॥३॥ वसिष्ठ सांगेल आपण । श्रीरामासी अभिषेचन । एका विनवी जनार्दन । कथा मनोज्ञ अवधारा ॥१०४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायण अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामलक्ष्मण-शस्त्रास्त्रविद्यादर्शनं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥ ओंव्या ॥१०४॥ श्लोक ॥२॥ ॥ एवं ॥ ॥१०६॥

## अध्याय दुसरा

### श्रीरामराज्याभिषेक प्रारंभ

**रामराज्याभिषेकाची तयारी, प्रजाजन व राजे यांची सभा :** श्रीरामचंद्राय नमः ॥ राज्याभिषेक श्रीरामासी । करावया उल्लास दशरथासी । बोलावोनि ज्येष्ठां श्रेष्ठांसी । गुह्य त्यांपासीं सांगतु ॥१॥ उदार वसिष्ठादि महाऋषींसी । पृथ्वीपाळ नृपवरांसी । सेनापती समग्रांसी । गुह्य त्यांपासीं सांगत ॥२॥ अष्टादश निजप्रजांसी । बोलोवोनि अति प्रीतीसीं । बसवोनि सन्मानेंसीं । त्यांपासीं काय मग बोले ॥३॥

परिश्रान्तोऽस्मि लोकस्य गुर्वीं धर्मधुरं वहन् । सोऽहं विश्राममिच्छामि पुत्रं कृत्वा प्रजाहिते ॥१॥
भवद्भिरपि तत्सर्वमनुवर्तध्वमद्य वै । अनुजातो हि मां सर्वैर्गुणैः श्रेष्ठा ममात्मजः ॥२॥
पुरंदरसमो वीर्ये रामः परपुरंजयः । तं चंद्रमिव पुष्येण युक्तं धर्मभृतां वरम् ॥३॥
यौवराज्ये नियोक्तास्मि प्रातः पुरुषपुंगवम् । अनुरूपः स वो नाथो लक्ष्मीवांल्लक्ष्मणाग्रजः ॥४॥
त्रैलोक्यमपि नाथेन येन स्यान्नाथवत्तरम् । अनेन श्रेयसा सद्यः संयोक्ष्येऽहमिमां महीम् ॥५॥
गतक्लेशो भविष्यामि सुते तस्मिन्निवेश्य वै । इति ब्रुवंतं मुदिताः प्रत्यदन्दन्नृपा नृपम् ॥६॥
वृष्टिमन्तं महामेघं नर्दत इव बर्हिणः । तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वकल्पस्य धीमतः ॥७॥

**राज्यसभेत दशरथाचे भाषण :** समस्तांसी सांगे दशरथ । राज्यीं अभिषेकावा रघुनाथ । हा माझा दृढ मनोरथ । तुम्हांसी अर्थ मानला कीं ॥४॥ समस्तांसी संमत । जो कीजे तो दृढ कार्यार्थ । तुम्ही माझे परम आप्त । निश्चितार्थ मज सांगा ॥५॥ ऐकें वसिष्ठा विशेषज्ञा । ममांगी बाणली वार्धक्यसंज्ञा[4]। अझूनि राज्यभोगाची प्रज्ञा । कायसी सर्वज्ञा मज आतां ॥६॥ दुष्टनिर्दळणीं अति पुरुषार्थ । गोब्राह्मणादि प्रजा समस्त । नित्य राखितां सुखस्वार्थ । राज्यभारें श्रांत मी झालों ॥७॥ ते श्रांततेसी विश्रांतता । राज्यभिषेक श्रीरघुनाथा । त्या श्रीरामाची योग्यता । तुम्हां समस्तां विदित असे ॥८॥ श्रीराम माझा ज्येष्ठांत ज्येष्ठ । श्रीराम वरिष्ठां वरिष्ठ । श्रीराम बळिष्ठां बळिष्ठ । श्रीराम वरिष्ठ वंदनीय ॥९॥ श्रीराम सर्वगुणी संपूर्ण । राज्यलक्षणीं सुलक्षण । साधुसेवेसी आल्हाद पूर्ण । गुरुवचन ब्रह्मतुल्य ॥१०॥ श्रीरामाचे प्रौढीचेनि पडिपाडें[5] । यम इंद्र वरुण बापुडे । श्रीरामप्रजापतेजापुढें । खद्योतपाडे[6] शशिसूर्य ॥११॥ श्रीरामाची सुंदर शोभा । लाजें मदन विरे उभा । श्रीराम वल्लभियां वल्लभा । लावण्यगाभा

---

शब्दार्थ - १. आवेश, २. दहा, ३. निकराचे, ४. म्हातारपण, ५. थोरवीपुढे, ६. काजव्यासारखे.

श्रीराम ॥१२॥ श्रीराम निधडा रणरंगधीर । सुबाहु मारिला अति दुर्धर । त्र्यंबकभंगाचा अति बडिवार[1] । शूरवीर श्रीराम ॥१३॥ श्रीरामभुजांचा प्रतापपुंज । जिंतिला प्रतापी भार्गव द्विज । श्रीरामभयेंचि निर्भय मज । होईन पूज्य त्रैलोक्यीं ॥१४॥ चैत्रमासीं पुष्यनक्षत्र । राज्याभिषेक श्रीरामचंद्र । त्रैलोक्य भोगिजे तेणें नरेंद्र । हें भाष्य निर्धार गुरुवाक्याचें ॥१५॥ माझा गुरु वसिष्ठ । तो त्रैलोक्यीं परम श्रेष्ठ । त्याचें वचन मज वरिष्ठ । रामा राज्यपट्ट प्रभाते ॥१६॥ प्रात:काळीं श्रीरघुनाथ । अभिषिंचणें हा निश्चितार्थ । गर्जोनि बोले दशरथ । तेणें समस्त आल्हादले ॥१७॥

सभाजनांची एकमुखाने संमती : राजे प्रजा सेना प्रधान । नगर नागरिकजन । ऐकोनि रायाचें वचन । उल्लासपूर्ण रामराज्यें ॥१८॥ ऐकोनियां घनगर्जित । मयूर थैकारें नाचत । तेंवि रामराज्यें समस्त । उल्लासत जन अवघे ॥१९॥

रामस्य पुरुषो लोके सत्यधर्मवतो गुणै: । समो न विद्यते कश्चिद्विशिष्ट: कुत एव तु ॥७॥
बहुश्रुतानां वृद्धानां ब्राह्मणानामुपासिता । तेनास्येहातुलाकीर्तिर्यशस्तेजश्च वर्धते ॥८॥

सुखावोनि संपूर्ण । अवघे बोलती आपण । श्रीराम रायां शिरोरत्न । गुणनिधान श्रीराम ॥२०॥ राम सत्यवादी पवित्र परम । असत्यवादी जपंतां रामनाम । तेही पावन होती नि:सीम । सत्यासी विश्राम श्रीरामें ॥२१॥ श्रीराम धर्मात्मा धीर परम । श्रीराम धर्माचें विश्रामधाम । धार्मिकी धर्मात्मा श्रीराम । धर्माश्रम श्रीराम ॥२२॥ गुणी गुणातीत श्रीराम । श्रीराम गुणांचें निजधाम । अप्रमेय आत्माराम । पुरुषोत्तम श्रीराम ॥२३॥ श्रीरामाची नवलस्थिती । नित्य नवी ब्राह्मणभक्ती । तेणें षडगुण रण येती । यश कीर्ति अतुलत्वें ॥२४॥ श्रीरामासी समसमान । तिहीं लोकीं न दिसे आन । मग त्याहूनि अधिक कोण । प्रमाणीं प्रमाण नव्हे राम ॥२५॥ ऐसें जाणोनियां श्रीरामातें । श्रीराम राजा जी आमुतें । आम्हीं अभिषिंचिला चित्तें । जाण निश्चित पूर्वींच ॥२६॥ त्या अभिषेकाची सत्यता । घरोघरीं हेचि कथा । श्रीराम राजा जी तत्वतां । जनीं वार्ता रामराज्याची ॥२७॥ प्रात:अभिषेकी रघुनाथ । सुमुहूर्तें सोहळा वेदोक्त । तोही पहावया उल्लासयुक्त । रामानुगत सर्वस्वें ॥२८॥ ऐसें बोलतां सकळां । त्यांचीं वाक्यें सुमनमाळा । रायें आवडीं घातली गळां । पुत्रसोहळाउत्साहें ॥२९॥

इति प्रत्यर्चितान्राजा ब्राह्मणानिदमब्रवीत् । वसिष्ठं वामदेवं च तेषामेवोपशृण्वताम् ॥९॥
चैत्र: श्रीमानयं मास: पुण्य: पुष्पितकानन: । यौवराज्याय रामस्य सर्वमेवोपकल्प्यताम् ॥१०॥
राज्ञस्तूपरते वाक्ये जनघोषो महानभूत । शनैस्तस्मिन्प्रशांते च जनघोषे जनाधिप: ॥११॥
वसिष्ठं मुनिशार्दूलं राजा वचनमब्रवीत् । अभिषेकाय रामस्य यत्कर्म सपरिच्छदम्: ॥१२॥
तदद्य भगवन्सर्वमाज्ञापयितुमर्हसि । ततश्रुत्वा भूमिपालस्य वसिष्ठों मुनिसत्तम ॥१३॥
आदिदेशाग्रतो राज्ञ: स्थितान्युक्तान्कृतांजलीन् । सुवर्णादीनि रत्नानि बलीन्सर्वौषधीरपि ॥१४॥

दशरथ बोले हर्षनिर्भर । वसिष्ठवामदेवादि[2] ऋषीश्वर । तुम्ही अवधारा समग्र । निजनिर्धार अभिषेका ॥३०॥ चैत्रमास अति पवित्र । वसंते वनशोभा विचित्र । गुरुपुष्य शुभनक्षत्र । श्रीरामचंद्रा अभिषेक ॥३१॥ ऐसा माझा निजनिर्धार । तुम्हांस मानेल साचार । तरी प्रात:काळी श्रीरामचंद्र । तुम्ही समग्र अभिषेक ॥३२॥ ऐकोनि रायाचें उत्तर । राजे प्रजा आणि नगरनर । मनें वचनें राजा रघुवीर । आम्हीं साचार अभिषिंचिला ॥३३॥ ऐसें बोलोनि समग्र । उल्लासें करिती जयजयकार । नादें कोंदले अंबर । शब्द सर्वत्र सुखें गर्जे ॥३४॥ नांदे सुखेंसी सुलीन होत । अवघे बैसले हर्षयुक्त । ते वेळी उठोनियां दशरथ । अभिवंदित सद्गुरूसी ॥३५॥

---

शब्दार्थ – १. मोठेपणा, २. माझा दृढ निधार.

वंदोनि वसिष्ठाचे पाये । म्हणे रामाभिषेका पाहिजे काये । तें सांगावया पाहें । सामर्थ्य आहे तुजपाशीं ॥३६॥ राजे प्रज्ञा प्रधानयुक्त । मजसकट समस्त । आम्ही तुझे आहों आज्ञांकित । तुम्हीं रघुनाथ अभिषिंचावा ॥३७॥ ऐकोनि रायाचें वचन । वसिष्ठ उठिला संतोषोन । अवलोकिती सभेचे जन । ठेले उठोन कृतांजली ॥३८॥ देशोदेशींचे भूपती। मुकुटकुंडलें छत्रपती । रायें आणिले अभिषेकार्थी । ते ते नृपती अवधारा ॥३९॥ पूर्वपश्चिमनृपती । उत्तरराजे चक्रवर्ती । दक्षिणदिशेचे भूपती । आले रघुपतिअभिषेका ॥४०॥ पर्वतवासींचे पर्वती । म्लेच्छराजे नेणों किती । द्वीपदीपींचे भूपती । आले गडपती गडपाळ ॥४१॥ देखोनि श्रीरामसाटोप । भार्गवजयाचा प्रताप । तेणें धाकें सकळही नृप । आपेंआप पैं आले ॥४२॥ तेही राजे अवघे जण । करावया वसिष्ठवचन । ठेले अंजलिपुट जोडून । सावधान वचनार्थी ॥४३॥ वसिष्ठमुखींचे वचन । काय देईल आज्ञापन । तें ते करावया सावधान । नृप संपूर्ण वचनार्थी ॥४४॥ आणिकहि देशोदेशिक । प्रजा प्रधान सकळिक । वसिष्ठवचनाचे चातक । रघुकुळटिळकाभिषेका ॥४५॥

समारंभाची तयारी, दूरदृष्टीने वसिष्ठांच्या योजना : समस्त देखोनि सावधान । वसिष्ठ बोले अति गर्जोन । अवे आणा उपायन[1] । पट्टपूजन[2] रघुनाथा ॥४६॥ शतानुशत कुंभ सुवर्णे । नानारत्नीं परिपूर्ण । रायांहीं आणावे आपण । पट्टपूजन रघुनाथा ॥४७॥ श्वेतवारू श्वेतहस्ती । श्वेतचामरें घेवोनि हाती । दशरथादि सकळ नृपती । पूजेप्रती उभे असा ॥४८॥ प्रजा प्रधान देशोदेशिक। तिहीं यथानुशक्ती देख । आणावे जी निजकनक। रघुकुळटिळकपट्टपूजे ॥४९॥ सपृच्छ सनख व्याघ्रचर्म[3] । सुवर्णश्रृंगी वृषभोत्तम । छत्र पांडुर मनोरम । अति उत्तम आणावें ॥५०॥ प्रात:काळीं सुमुहूर्त । जे जे उपचार वेदोक्त । ते ते आणावे समस्त । अभिषेकार्थ श्रीरामा ॥५१॥ ब्राह्मणां द्यावें निमंत्रण । उत्तम निपजवावें मिष्टान्न । सर्वकर्मी ब्राह्मणभोजन । नित्य निर्विघ्न कार्यार्थी ॥५२॥ रथ गज वाजी[4] सालंकार । सेना भृंगारावी विचित्र । देवालयें अति पवित्र । राममंदिर श्रृंगारा ॥५३॥ स्वयें वसिष्ठें ऐसी । आज्ञा दिधली समस्तांसी। तें तें कार्य शीघ्रतेसीं । अति उल्लासीं पैं केलें ॥५४॥ वैकुंठींची पूर्ण प्रतिमा[5] । राजमंदिरीं आणिली शोभा । चैतन्यतेजें मिरजे सभा । लाजे उभा कैलास ॥५५॥ देवालयीं मूळारंभा । स्वप्रकाशें प्रकाश गर्भा । चिदानंदें शोभे शोभा । गर्भी पद्मनाभा महापूजा ॥५६॥

सर्वत्र नगरीत आनंद व उत्साह, अयोध्या श्रृंगारिली : राजमंदिरीं अगाध थोरी । ध्वजा पताका प्रसादशिखरीं । महोत्साह घरोघरीं । द्वारोद्वारीं रत्नदीप ॥५७॥ राजांगणीं वाडेंकोडें । कुंकुम-चंदनाचे सडे । नाना रंगमाळा चहूंकडे । लाजे त्यापुढें वसंत ॥५८॥ राजसभा शोभायमान । शोभेसी नंदनवन शरण । लोटांगणीं यें चित्ररथवन । विराजमान श्रीरामें ॥५९॥ वैकुंठींचा श्रीरामरावो । त्याच्या अभिषेकीं उत्साहो । वैकुंठींचा सर्व समुदावो । आला पहा हो अयोध्येसी ॥६०॥ दासदासी नगरजन । राजे सेना प्रजा प्रधान । वस्त्रीं भूषणीं शोभायमान । वैकुंठभुवनसम शोभा ॥६१॥ राजबिंदी दोहीं हारीं । शोभा शोभे नानाकुसरीं । ध्वजा पताका श्रृंगारीं । रचिल्या वळी[6] दीपमाळा ॥६२॥ कस्तूरीचंदनकर्दमयुक्त । मार्ग शिंपिले सुवासित । वासें वसंत होतसे मूर्च्छित । श्रीरघुनाथनिजशोभा ॥६३॥ हाटवाटियाभागीं[7] दोहीं । चिद्रत्नें जडित शोभा पाहीं । हरिकीर्तनें ठायीं ठायीं । गर्जती देहीं[8] हरिनामें ॥६४॥ मखरें शोभती कुसरीं ।

शब्दार्थ - १. नजराणे, २. राज्याभिषेक, ३. वाघाचे कातडे, ४. घोडे, ५. प्रतिच्छाया, ६. रांगेने, ७. बाजारविभागात, ८. देहधारी प्राणी.

मुक्ताफळांचिया हारी । सुमनमाळा चूतांकुरीं[1] । द्वारोद्वारीं तोरणें ॥६५॥ पूर्ण कळस द्वारोद्वारीं। सदीप शोभा तयांवरी । गुढिया उभविल्या घरोघरीं । नरनारी उत्सवा ॥६६॥ कोठे अभिषेकाची वार्ता । कोठें करिती रामकथा । एकां अत्यंत एकाग्रता । श्रीरघुनाथ पहावया ॥६७॥

दशरथास चिंता, ती रामास निवेदन करतो : निजनगर शोभायुक्त । सकल जन उल्लासत । तें देखोनियां दशरथ । जाला शंकित निजमानासीं ॥६८॥ श्रीरामभिषेकाचा सोहळा । मी काय देखेन आपुलें डोळां । हे भाग्य दुर्लभ कपाळा । म्हणोनि डोळां अश्रु आले ॥६९॥ पाचारोनि श्रीरामासी । गुह्य सांगे तयापासीं । म्हणे प्रात:काळीं गुरुपुष्यासी । तूं यौवराज्यासी अंगीकारीं ॥७०॥ येरें चरणीं ठेविला माथा । तंव गहिंवरू आला दशरथा । ऐक बापा श्रीरघुनाथा । गुह्य तत्वतां सांगेन ॥७१॥

दुष्ट ग्रहांचा फेरा : तुझे अभिषेकाचा निर्धार । जैंपासोनि केला साचार । तैंपासोनि ग्रह क्रूर । गगनीं अत्युग्र भासती ॥७२॥

अवष्टब्धं च मे राम नक्षत्रं दारुणग्रहैः । आवेदयंति दैवज्ञा जन्मस्थो मां शनैश्वर : ॥१५॥
अपि चाद्याशुभान्राम स्वप्रान्पश्यामि राघव । सनिर्धाता दिवोल्काश्च पतंति हि महास्वनाः ॥१६॥
प्रायेण च निमित्तानरामीदृशानां समुद्भवे । राजा हि मृत्युमाप्नोति घोरां चापदमृच्छति ॥१७॥

माझे राशीस शनैश्वर । सांगती ज्योतिर्विद नर । तोही लागत अति क्रूर । पीडा दुर्धर तयाची ॥७३॥ माझें जें का जन्मनक्षत्र । तेथें वक्री भौम शनैश्वर । तयांसी मिनला अतिचार[2] । अति सत्वर गुरु देखा ॥७४॥ मृग नक्षत्रीं माझी उत्पत्ती । पुनर्वसूसीं तुज जन्मप्राप्ती । दोघांस दिसताहे ग्रहगती। जाण निश्चितीं रघुनाथा ॥७५॥ सूर्ययुक्त राहु रोहिणीसीं । केतु बैसला असे विशाखेसीं । ते दोघे वैरी सूर्यासी । रविरोहिणींसी ग्रासूं पाहती ॥७६॥ मृग मिथुन माझीं राशी । बारावा रवि राहु वृषभासीं । क्रूर ग्रहगति दिसे ऐसी । विनाशासी निजमूळ ॥७७॥ शनि भौम दोनी वक्री[3] । तेथेचि गुरु आला अतिचारी । हे क्रूर माझे राशीवरी । तेचि रामचंद्री बारावे ॥७८॥

अनिष्ट स्वप्ने व त्याची अशुभ फले : आणिकही एक दुश्चिन्ह । म्यां देखिले दुष्ट स्वप्न । पुढील भाणें[4] वाढिलें संपूर्ण । नेले झडपोन घारीनें ॥७९॥ अभ्रेंवीण[5] अति बोभाटें[6] । विजा पडती अति नेटें । जीव जाऊं पाहे कडकडाटें । येणें उद्धटें अति नि:पातु ॥८०॥ सहित मेरु कुळाचळ । भूकंप जाहला अति प्रबळ । श्रीरामा या चिन्हाचें फळ । जाण केवळ अनिष्ट ॥८१॥ या चिन्हांचा निजविलास । राज्यभ्रंश कां वनवास । अवश्य होय जीवनाश । परम त्रास सुहृदांसी ॥८२॥ यालागीं गा रघुनाथा । यौवराज्यअभिषेकता । अंगीकारीं अति शीघ्रता । प्रात: पुष्यता साधूनी ॥८३॥

श्रीरामांचे कौसल्या मंदिरात आगमन : श्रीराम म्हणे आज्ञा प्रमाण । म्हणोनियां वंदिले चरण । रायें संतोषोनि जाण । पाठविला आपण निजधामा[7] ॥८४॥ रामें पुसोनि नृपवरा। आला कौसल्येच्या निजमंदिरा । येरी देखोनि श्रीरामचंद्रा । नयनद्वारा निवाली ॥८५॥ श्रीराम सांगें कौसल्येसी । प्रात:काळीं यौवराज्यासी । रायें नेमिलें अभिषेकासीं । तेणें उल्लासी कौसल्या ॥८६॥

राज्याभिषेकवार्तेमुळे कौसल्या व सुमित्रेस आनंद : श्रीरामराज्याभिषेक । तेणें कौसल्येसी परम हरिख । गोभूक्षौमांबरें कनक । विप्रा अनेक देती जाली ॥८७॥ हरिखें आला लक्ष्मण ।

शब्दार्थ - १. आंब्याच्या पल्लवांनी सुशोभित, २. ग्रहांचे आपला क्रम सोडून दुसऱ्या राशीला जाणे, ३. ग्रहांचे मागच्या राशीस येणे ते वक्री, ४. पात्र, ५. पावसावाचून, ६. कडकडाटाने, डगडगटाने, ७. स्वत:चे वसतीस्थान.

त्यासी राम बोलिला आपण । माझें राज्य तें तुझें जाण । मीतूंपण आम्हां नाहीं ॥८८॥ गोडी गुळाचा विवेक । नांवे दोन स्वरूप एक । तैसी आम्हां तुम्हां देख । वेगळीक असेना ॥८९॥ अलंकार आणि कनक । आकार विकार दोनी एक । तैसे आम्ही तुम्ही देख । सर्वदा ऐक्य सर्व कर्मीं ॥९०॥ जैसा जीव आणि प्राण । तैसे राम आणि लक्ष्मण । ऐकोनि श्रीरामाचें वचन । केलें निंबलोण कौसल्यें ॥९१॥ सुमित्रेसी आल्हाद पूर्ण । तिनें देखोनि रामलक्ष्मण । ओंवाळोनि दोघे जण । हरिखें आपण धन वाटीं ॥९२॥ श्रीरामासी लोटांगण । घालोनिया लक्ष्मण । तुझे सेवेचें सुख संपूर्ण । यास प्रमाण चरण तुझें ॥९३॥ श्रीरामा तुझे सेवेवीण । त्रैलोक्याचें राज्य पूर्ण । तें मज ब्रह्मस्वासमान[१] । तुझी आण वाहतसें ॥९४॥ ऐकोनि लक्ष्मणाचे वचन । रामें दिधलें आलिंगन । म्हणे तूं जिवलग संपूर्ण । सखा सज्जन सर्वस्वें ॥९५॥

रामांचे स्वगृही गमन, व्रतपरिपालन : याउपरी रघुनंदन । कौसल्यासुमित्रेसी नमन । करोनि लक्ष्मणाची बोळवण । स्वधामा आपण येता जाला ॥९६॥ प्रात:काळी अभिषिंचन । रामसीतेसी उपोषण । सांगावया वसिष्ठ श्रेष्ठ पूर्ण । रायें आपण पाठविला ॥९७॥ सद्‌गुरू आला निजभवनासी । श्रीराम अत्यंत उल्हासीं । लोटांगण घालोनि तयासी । मग पायांसी लागला ॥९८॥ पूजामधुपर्कविधान । सालंकृतशतगोदान[२] । देवोनि केलें चरणक्षाळण । तीर्थप्राशन केलें रामें ॥९९॥ ते वेळीं वसिष्ठें आपण । करविलें पुण्याहवाचन । श्रीरामसीतेसि उपोषण । केला संपूर्ण संकल्प ॥१००॥ अभिषेकार्थ होमविधान । होमशेषघृतप्राशन । कुशास्तरणीं[३] भूमिशयन । दोघांलागून करविलें ॥१॥ वसिष्ठ सांगे रायापाशीं । प्रात:काळीं अभिषेकासी । उपोषण श्रीरामसीतेसी । कुशास्तरणीं[३] भूमिशयन ॥२॥ राजा वसिष्ठासी करी नमन । म्हणे केल्या रामासी अभिषिंचन । ऋणत्रयापासून मी उत्तीर्ण[४] । सत्य जाण गुरुवर्या ॥३॥ वसिष्ठ बोले आल्हादेंसीं । श्रीरामराज्याभिषेकासीं । स्वर्गसुख राया देखसी । या वाक्यें उल्हासी दशरथ ॥४॥ राज्याभिषेक रघुनाथा । तेणें इंद्रादिदेवां समस्तां । मांडलीसे कल्पांतचिंता । तिहीं विधाता प्रार्थिला ॥५॥ श्रीराम अभिषेकासी विघ्न । घरचेघरीं उपजेल पूर्ण । ते युक्ती सांगेल चतुरानन । दशवदनवधार्था ॥६॥ एकाजनार्दना शरण । ब्रह्मरसें नवरस संपूर्ण । विघ्नें सुखावे रघुनंदन । तें निरोपण अवधारा ॥७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामाभिषेकप्रारंभो नाम द्वितीयोध्याय: ॥२॥ ओंव्या ॥१०७॥ श्लोक ॥१८॥ एवं ॥१२५॥

## अध्याय तिसरा

### दुष्ट मंथरेचा कैकेयीवर प्रभाव

रामराज्याभिषेक निश्चितीमुळे इंद्रादिकास चिंता, त्या देवांची ब्रह्मदेवाला विनंती : श्रीसद्‌गुरु-रामचंद्राय नम: ॥ श्रीरामराज्याभिषिंचन । तेणें इंद्रादिकां चिंता गहन । समस्त देवीं मिळोनि जाण । चतुरानन विनविला ॥१॥ देव म्हणती ब्रह्मयासी । तुझें आश्वासन आम्हांसी । राम अवतरला सूर्यवंशी । तो रावणासी वधील ॥२॥ सपुत्र सबंधु सप्रधान । राम करील राक्षस-कंदन[५] । तेणें देवांस बंधमोचन[६] । ते मिथ्या वचन होऊं पाहे ॥३॥ सत्य करीं आपुलें वचन । आमुचें करीं बंधमोचन । आमचे आपत्तीचें विंदान[७] । सावधान अवधारीं ॥४॥ इंद्र बारी चंद्र छत्रधारी । यम पाणी वाहे घरीं । वायु सर्वदा पूजे ओसरी । विधि तेथें करी दळकांडा ॥५॥

---

शब्दार्थ - १. ब्राह्मणाच्या धनासारखे घेण्यास अयोग्य, २. अलंकारांनी सजविलेल्या शंभर गाईंचे दान. ३. दर्भांच्या शय्येवर, ४. मुक्त , ५. राक्षसांचा संहार, ६. तुरुंगातून सुटका, ७. युक्ती.

अश्विनी सूनू[१] दोनी । तिही परिमळ[२] द्यावे स्त्रियांलागुनी । विलंब होतां अर्ध क्षणीं । दासी धांवोनि धुमसिती[३] ॥६॥ माको असे तराळी । सटवी बाळंती प्रक्षाळी । रात्रीं जागर घाली कराळी । मेसको वळी शोभनिका[४] ॥७॥ मैराळ देव कानडे । करिती राक्षसांच्या दाढ्याखाडें । आरसा न दाविती जयापुढें । तोचि रोकडे बुकाळी ॥८॥ नवग्रहांची पीडा गाढी । ते रावणें घातले बांधवडीं । पायीं घालोनियां बडी । पायरीबुडीं अडकविले ॥९॥ राहू केतू शनि अंगारी । त्यांची पीडा सुरासुरीं । रावणें करूनियां पायरी । मंचकावरी वेंधतू ॥१०॥ विघ्न राहूं न शके जयापुढें । तो गणेश होवोनि बापुडें । गाढवांचे कळप गाढे[५] । चहूंकडे वळीतसे ॥११॥ अग्नीस आपदा बहुवस । रावणाचें मैळे[६] असोस[७] । नानापरींचे स्पर्शदोष । धूत अहिर्निशीं धुपधुपित ॥१२॥ उदकक्रिया[८] वरुणाहाती । व्यजनसेवा[९] नित्य वसंतीं । निरोप सांगावया बृहस्पती । प्रजापति शांतिपाठक ॥१३॥ ऐसें आम्ही देव समस्त । रावणाचे नित्यांकित । लंकेसि आलिया रघुनाथ । बंधनिर्मुक्त करील ॥१४॥ राघवासी राज्याभिषिंचन। तैं त्यासी न घडे लंकागमन । आमचें नव्हे बंधमोचन । अति दीन वदताती ॥१५॥

विघ्न करण्यासाठी ब्रह्मदेवाची विकल्पास आज्ञा : ऐकोनि देवाची विनंती । ब्रह्मा विचारी निजचित्तीं । राज्याभिषेकासी विघ्नप्राप्ती । ते दृढयुक्ती योजिली ॥१६॥ अविद्येचा अति लाकडा। कार्यनाशासी अति नेटका[१०] । विघ्न करावया रामाभिषेका । विकल्प देखा धाडिला ॥१७॥

विकल्पाच्या अडचणी : विकल्प म्हणे ब्रह्मदेवा । पट्टाभिषेक श्रीराघवा । तेणे माझा कोण केवा । सर्वथा रिघावा नव्हे माझा ॥१८॥ जेथें श्रीरामाचें नाम । तें स्थान मजसी अति दुर्गम रामराज्यासी विघ्न परम । तें कर्म मज ठाकेना ॥१९॥ श्रीरामाचें राज्य जेथ । विकल्प केंवी रिघे तेथ । श्रेष्ठा सर्वज्ञा तूं समर्थ । श्रीरामीं पुरुषार्थ न चले माझा ॥२०॥

ब्रह्मदेवाचे रहस्यकथन : ब्रह्मा सांगे गुह्य गोष्टी । न पडोनि श्रीरामाचे दृष्टीं । रिघावें मंथरेचे पोटीं । विकल्पपुष्टी तीमाजी ॥२१॥ मंथरा कैकेयीची आंदणी दासी । ते दासी भरतराज्या अभिलाषी । ते सदा श्रीरामातें द्वेषी । सापत्नभावेंसी[११] अति दुष्ट ॥२२॥ जेथें श्रीरामाचा द्वेष । तेथें विकल्पवस्ती सावकाश । तीमाती करोनियां प्रवेश । करी विध्वंस अभिषेका ॥२३॥ विध्वंसोनि अभिषेकासी । राज्याभिषेक भरतासी । श्रीराम करावा वनवासी । या कार्यार्थासी शीघ्र करीं ॥२४॥

कलिंगणफळाच्या द्वारे मंथरेच्या शरीरात प्रवेश, विकल्पाचा तिच्यावर प्रभाव : विकल्प म्हणे वचन सत्य । मंथरा वसे अयोध्येआंत । माझा प्रवेश नव्हे तेथ। केंवी कार्यार्थ साधेल ॥२५॥ ब्रह्मा सांगे विकल्पासी । नगराबाहेर वनक्रीडेसी । मंथरा येईल आरामासीं[१२] । तुझ्या प्रवेशासी तेथें संधी ॥२६॥ विकल्प लागे ब्रह्मयापायीं । प्रवेशेन मंथरादेहीं । वश्य करोन कैकेयी । तरी राज्य नाहीं भरतासी ॥२७॥ श्रीराम ज्येष्ठ भरत कनिष्ठ । कैसेनि घडेल राज्यपट । वचन न मानिती वरिष्ठ । ज्येष्ठ श्रेष्ठ निजज्ञाते ॥२८॥ ब्रह्मा म्हणे विकल्पासी । तूं सर्वज्ञ ज्ञाता होसी । भरत पावे रघुराज्यासी । त्या वर्माची मी सांगेन ॥२९॥ दशरथें निजभाकेसीं । दोन वर दिधले कैकेयीसी । एकें वरें श्रीराम वनवासी । एकें भरतासी राज्यपट ॥३०॥ ऐकोनि ब्रह्मयाची गोष्टी । विकल्प बांधी शकुनगांठी । संचरावया मंथरेपोटी । अति संकटीं चालिला ॥३१॥ अयोध्या देखोनि रामप्रतापें । विकल्प धाकें चळीं कापें । तेथींचा तेथें स्वयें लपे ।

शब्दार्थ – १. अश्विनीकुमार, २. सुगंध द्रव्ये, ३. मारतात, ४. शेणी, ५. मोठे, ६. मळ, ७. अतिशय, ८. पाणी भरणे, ९. वारा घालणे, १०. उत्तम, ११. सवतीमत्सराने, १२. बागेमध्ये.

श्रीरामदर्पें[1] साशंक ॥३२॥ गुप्त रहावया बुडी । लपे हिंवराचिया खोडीं । निळीची सुनीळ झाडी । देवोनि दडी स्वयें राहे ॥३३॥ म्हणोनि तीं झाडें जाण । अपवित्र म्हणती सज्जन । तें तें विकल्पाचें स्थान । विध्वंसन शुभकार्या ॥३४॥ या झाडावेगळें कांहीं । विकल्प स्पर्शावया ठाव नाहीं । यालागीं ती निंद्य पाहीं । सर्वकार्यासी अपवित्र ॥३५॥ कलिंगफळीं[2] अपवित्र वस्ती । जे सेविती त्यां विकल्पप्राप्ती । मंथरेसी त्या फळाची प्रीती । देखे अवचितीं आरामीं ॥३६॥ मंथरा आली आरामासी । देखोनि कलिंगफळासी । ते जाली अति उल्लासी । सेवावयासी सादर ॥३७॥ कलिंगफळ आवडे भारी । सेवितां अति प्रीतिकरीं । विकल्प संचरला भीतरीं । क्षणामाझारी व्यापिली ॥३८॥ मग विचारी हृदयांत अर्थ । पढियंतीचा[3] सुत भरत । तो सांडोनियां रघुनाथ । राज्य पावत हें कुडें ॥३९॥ धाकुटा मातुळा दवडोनि भरत । मागें अभिषेकी रघुनाथ । केवळ कुडा[4] हा दशरथ । अति अनर्थ हा आम्हां ॥४०॥ राज्य आल्या श्रीरामासी । भरत होईल परदेशी । कैकेयी होईल कौसल्येची दासी । मग आम्हांसी सुख कैचें ॥४१॥

मंथरेचा रामाविषयी मत्सर, कुब्जा का म्हणतात? : ऐसी भावना[5] भावूनी[6] । रामराज्याचा द्वेष मनीं । मंथरा क्रोधाग्नि होऊनी । कैकेयीभवनीं प्रवेशली ॥४२॥ मंथरा सहज श्रीरामातें द्वेषी । आंगण झाडी द्वेषभावेसीं । पुढें असतां श्रीरामासी । रज[7] त्यापासीं लोटिलें ॥४३॥ श्रीराम म्हणे मंथरेसी । द्वेषें वरते कां न पाहासी । ते तूं अधोमुखी कुब्जा होसी । श्रीरामें तिसी शापिलें ॥४४॥ त्या शापाचे प्राप्तीसीं । पावली सत्वर आघातासी । यालागीं कुब्जा हो तिसी । स्वभावेंसीं निजनाम ॥४५॥

रामराज्याचा आनंदसोहळा पाहून मंथरेचा थयथयाट : रामराज्याचा सोहळा । जंव जंव मंथरा देखे डोळां । तंव तंव क्रोध चढे बळा । द्वेषाचा आगळा[8] आक्रोश ॥४६॥ कैकेयीचे निजभवनीं । रामराज्याचा उल्लास मनीं । गुढिया तोरणें ध्वजा सुमनीं[9] । मंथरा देखोनि अति तप्त ॥४७॥ श्रीरामराज्यें उल्लासोनी । कैकेयी अलंकारभूषणीं । पर्यंकी[10] विश्रांत[11] ओटांगणी[12] । दोघी जणी विडिया देती ॥४८॥ एकी घालिती विंजणवारा । तंव तेथें आली मंथरा । क्रोधें नेत्र भोवंडी गरगरां । द्वेषें थरथरां कांपत ॥४९॥

मंथरोवाच –

उत्तिष्ठ मूढे किं शेषे सौभाग्यबलगर्विते । उपप्लुतमघौघेन नात्मानमवबुध्यसे ॥१॥
अनिष्टे सुभगाकारे सौभाग्येन विकत्थसे । चलितं तव सौभाग्यं नद्याः स्रोत इवोष्णगे ॥२॥

मंथरा कैकेयीकडे जाते, क्रोधाचा आविष्कार : मंथरा अति क्रोधेंसीं । काय बोले कैकेयीसी । उठीं मूढे काय निजसी । सुख मानिसी तें दुःख ॥५०॥ रामराज्याचें मानिसी सुख । गुढियातोरणें अति हरिख । तेंचि तुज होय महादुःख । परी तूं मूर्ख नेणसी ॥५१॥ मी रायाची पढियंती । तेणें गर्वें तुज पडिली भ्रांती । सौभाग्य गेलें कौसल्येप्रती । तें तूं निश्चितीं नेणसी ॥५२॥ जळें केळी पोफळी वाढती । ते जळस्रोत[13] आलिया मूळाप्रती । तेणेंचि ते वृक्ष उलथती । ते नाशस्थिति तुज आली ॥५३॥ ऐकोनि मंथरेची उग्रवाणी । कैकेयी सौभाग्यशिरोमणी । तिसी पुसे आश्वासोनी । क्रोध कैसेनि तुज आला ॥५४॥

कैकेय्युवाच–कैकेयी त्वब्रवीत्कुब्जां कच्चित्क्षेमं न मंथरे । विषण्णवदनां हि त्वां लक्षये भृशदुःखिताम् ॥३॥

कैकेयीला आश्चर्य व जिज्ञासा : कोणे तुज काय अपमानिलें । तुज कोणें काय गांजिलें ।

---

शब्दार्थ – १. श्रीरामाच्या भीतीने, २. कलिंगण फळात, ३. आवडतीचा, ४. वाईट, दुष्ट, ५. कल्पना. ६. कल्पून, ७. केर, ८. विशेष, ९, पुष्पयुक्त, १०. पलंगावर, ११. स्वस्थ पडून, १२. तक्क्याला टेकून, १३. पाण्याचे ओघ.

तुज कोणीं काय बोलिलें । तें मज वहिलें सांग पां ॥५५॥ तुं माझी जिवलग होसी । कधी क्रोध न देखें तुजपासी । क्रोध सांडावा मज सांगसी । ते तूं दुःखी होसी अति क्रोधें ॥५६॥ तुझे ठायीं चिंता दरुण । चिंतेनें मुख दिसे मळिण । ऐसें तुज दुःख कोण । तें मज संपूर्ण सांग पा ॥५७॥ तुज कोण बोलिलें दुष्ट मात । कोणें तुजकडे उचलिला हात । त्याचा करीन मी घात । समूळ वृत्तांत मज सांगे ॥५८॥

मंथरा तु वचः श्रुत्वा कैकेय्या मधुराक्षरम् । उवाच क्रोधसंयुक्ता वाक्यं वाक्यविशारदा ॥४॥

स्वास्म्यगाधे भये मग्ना दुःखशोकसमन्विता । दह्यमानानलेनेव त्वद्धितार्थमिहागता ॥५॥

मंथरेचे रामासंबंधी द्वेषाविष्करण : ऐकोनि कैकेयीचें वचन । मंथरा जाली क्रोधायमान । तुज आलें हो दारुण विघ्न । तें तूं आपण नेणसी ॥५९॥ राजा दशरथ आपण । तुज छळितो[१] संपूर्ण । त्याचें तूं नेणसी लक्षण । पढियंतीपणें अति गर्वी ॥६०॥ तूं गर्वित जे राज्यवैभवेंसीं । तें राज्य राजा देतो श्रीरामासी । वैभव गेलें कौसल्येपासीं । तूं नेणसी मूर्खत्वें ॥६१॥ तुज आलें दुःख गहन । त्यामाजी मी अति निमग्न । तुझेनि दुःखें दह्यमान[२] । तुझें मूर्खपण देखोनी ॥६२॥ तुझिया वृद्धीं मी वर्धमान । तुझेनि सुखें मी सुखसंपन्न । तुझेनि दुःखें दुःखायमान । तुझेनि जाण अति संतप्त ॥६३॥ राजा वैभवलोभें तुजशीं । तेणेंचि रायें तूं ठकिजेसी । भरत दवडोनि मातुळासी[३] । मागें रामासी राज्यपट ॥६४॥ राज्य दिधलिया श्रीरामासी । दास्यभोग तो भरतासी । सत्तासामर्थ्य कौसल्येसी । तूं श्लाघसी[४] मूर्खत्वें ॥६५॥ तूं माझे वाक्य विवेकें विवरीं । होई भरतासी साहाकारी । आपले हित आपण करीं । गर्वावारी ठकूं नको ॥६६॥

भरतराज्यभिषेकाबद्दल कैकयीस परमानंद : ऐकोनि मंथरेचें वचन । कैकेयी झाली सुखसंपन्न[५] । रत्नखचित कंठाभरण । दिधलें दान मंथरेसी ॥६७॥ कंठींचें पदक अमोलिक । मंथरेसी देवोनियां देख । रामराज्याचें सर्वांसी सुख । तूंचि कां दुःख मानिसी ॥६८॥

रामे वा भरते वाहं विशेषं नोपलक्षये । तस्मातुष्टास्मि यद्राजा रामं राज्योभिषेक्ष्यति ॥६॥

भरताहुनियां अधिक । राम प्रिय मज आत्यंतिक । तूं मूर्खत्वें मानसी दुःख । मज महासुख रामराज्यें ॥६९॥ भरत इष्ट राम अनिष्ट । ऐसें मानिती ते महापापिष्ठ । राम ज्येष्ठां अति श्रेष्ठ । राज्याभीष्ट[६] श्रीराम ॥७०॥ जैसा भरत तैसाचि राम । मज तंव दोन्ही समसमान । कुब्जे[७] तूं कां मानिसी विषम । मूर्ख परम तूं एकी ॥७१॥

मंथरा-कैकेयीचा संवाद : ऐकोनि कैकेयीचें वचन । कुब्जा क्रोधें मूर्च्छापन्न । कंठीचें काढोनि आभरण । दिधलें टाकोन अति रागें ॥७२॥ राज्य गेलें श्रीरामासी । वैभव गेलें कौसल्येसी । ठकिलें दशरथें तुजसी । सुख मानिसी मूर्खत्वें ॥७३॥ कुब्जा अति क्रोधें बोलत । कैकेयी तीतें संबोधित[८] । राम रायाचा ज्येष्ठ सुत । अधिकार प्राप्त राज्याचा ॥७४॥ राम गुणी गुणगंभीर । त्रैलोक्यामाजी महाशूर । त्यासी राज्याचा अधिकार । तूं पामर रामद्वेषी ॥७५॥ राम भरतासी करील वोखटें[९] । हें तंव काळत्रयीं न घटे । कुब्जे बोलसी तितुके खोटें । श्रीराम तूं हट्टें द्वेषिसी ॥७६॥ ऐकोनि कैकेयीची गोष्टी । कुब्जा रागें कपाळ पिटी । तूं एक मूढ या सृष्टीं । राम राज्यपटीं बैसविसी ॥७७॥ कैकेयी नायके आपुले बोला । ऐसा मंथरेनें निश्चय केला । तुणें दुःख न देखवे मजला । प्राण आपुला मी त्यागीन ॥७८॥ म्हणोनि गडबडां लोळे । केश सुटले मोकळे । कैकेयी उठोवोनि तये वेळे । भावबळें आलिंगी ॥७९॥ क्षेम

शब्दार्थ - १. फसवितो, २. अंतःकरण जळते आहे. ३. आजोळी, आईच्या माहेरी, ४. मुरडतेस, ५. प्रिय, ६. राज्याचे हित, ७. मंथरे, ८. समाधान करते, ९. वाईट.

देतां नवलपरी । विकल्प होता मंथरेउदरीं । तो रिघाला कैकेयीमाझारीं । क्षणाभीतरीं अति वेगें ॥८०॥ हृदया हृदय लागतां देख । दोहीं ठायीं विकल्प एक । त्याढिन्नला आत्यंतिक । रामाभिषेकदृढद्वेषी ॥८१॥ मंथरा बोले कैकेयीप्रती । रामराज्य तुज अपघाती । तें तू न मानसी चित्तीं । म्यां तुज किती शिकवावें ॥८२॥ दास दासी तुज अनेक । परी ते दाशरथि-सेवक । तुज आत्पत्वें मीच एक । मजही मूर्ख तूं म्हणसी ॥८३॥

सापत्नभावाचे शब्दचित्र : सांपत्न[1] ते केवळ शत्रु । तूं हा न मानसी माझा मंत्रू[2] । येचविषयीं शास्त्रविचारू । पूर्वापारू सांगेन ॥८४॥ कश्यपापासूनि संभूत । सापत्नबंधु देवदैत्य । ते येरयेरांचा करिती घात । पुराणार्थ गर्जती ॥८५॥ येचि अर्थीं वेदोक्ती[3] । याज्ञवल्की महामूर्ती । बोलिला उपनिषदाप्रती । ते प्रचीति अवधारीं ॥८६॥

देवासुरविमर्दाश्च श्रुता बहुविधा त्वया । स्वार्थास्वार्थं स्वमुद्दिश्य भ्रात्रा भ्राता बहिष्कृतः ॥७॥

भ्रातृणामेकजातानामेकद्रव्याभिलाषिणाम् । पिशुनानां न पश्यामि सौभ्रात्रं क्वचिदप्यहम् ॥८॥

एवं वेदशास्त्रविचारीं । सापत्न ते मुख्य वैरी । तुवांही पुराण परिसिलें[4] घरीं । तें तुज गर्वेंकरीं नाठवे ॥८७॥ देव आपले स्वार्थसिद्धीं । दैत्यांतें[5] मारिती महायुद्धीं । दैत्य आपले हितावबोधीं[6] । देवां ग्रासूं पाहती ॥८८॥ पाहें पां श्वानाचियेपरी । भांडूं लागती एकाहारी । तैसा कलहो राजपुत्रीं । कैंची मैत्री सापत्नीं ॥८९॥

इंद्राचे दितीशी कपटवर्तन : दिति देवांची सापत्नमाता । तिसी गरोदर असतां । तिच्या गर्भाच्या करावया घाता । इंद्र विनीत सेवा[7] करी ॥९०॥ पाहोनियां विषम संधी । इंद्र तिचा गर्भ वधी । वज्रें सप्तसप्तधा छेदी । केले विशुद्ध मरुद्गण ॥९१॥ यालागीं सापत्नांसी[8] थोर । स्वभावें सदा नित्य वैर । हा नेणसी तूं विचार । मजचि पामर तूं म्हणसी ॥९२॥

कैकेयीवर झालेला विपरीत परिणाम : ऐकोनि मंथरेचिया बोला । कैकेयीसी उल्लास जाला । राज्याभिषेक नव्हे भला । श्रीरामीं धरिला दृढ द्वेष ॥९३॥ राम ज्येष्ठ भरत कनिष्ठ । कनिष्ठासी राज्यपट[9] । वचन न मानीं हें स्वयें वसिष्ठ । तोही अति श्रेष्ठ निजज्ञानें ॥९४॥ जरी म्यां राजा वश्य केला । तरी वसिष्ठ नायके माझ्या बोला । कनिष्ठा राज्यपट वहिला । नाहीं बोलिला शास्त्रार्थें ॥९५॥ वसिष्ठ सांगेल शास्त्रार्थ । तेथें काय करील दशरथ । अटक[10] पडलिया वेदोक्त । राज्य भरत केवीं पावे ॥९६॥

मंथरेने सुचविलेली युक्ती : मंथरा सांगे कैकेयीसी । जरी तूं माझा बोल करिसी । राज्य साधीन भरतासी । क्षणार्धेसीं मी एक ॥९७॥ कैकेयी बोले पुढती । कोणे युक्तीं राज्य भरतीं । साधिसील ते उपपत्ती[11] । यथानिगुतीं मज सांगें ॥९८॥ वसिष्ठवामदेवादि ऋषी । राज्या मानितील भरतासी । ते तुज युक्ती आहे कैसी । यथार्थेसीं मज सांगे ॥९९॥

पूर्वीच्या दोन वरांची आठवण : मंथरा बोले आपण । तुझी तुज नाहीं आठवण । रायें करूनि भाषप्रमाण[12] । दोन वर पूर्ण दिधले ॥१००॥ ते दोन वर रायापासीं । मागावे ये संधीसीं । एकें राम वनवासी । एकें भरतासी राज्यपद ॥१॥ पूर्वदत्त मागतां आम्हांसी । कांही न बोलवे वसिष्ठासी । नेदीं न म्हणवे दशरथासी । निजभाकेसी[13] गुंतला ॥२॥ ऐकोनि मंथरेचें वचन । कैकेयीसी विस्मय पूर्ण । कुब्जे तूं तंव अति सज्ञान । वरद[14] स्फुरण तुज आलें ॥३॥ मज रायाचें वरदान । परी माझी मज नाहीं आठवण । त्याचें समयीं स्फुरलें ज्ञान । अति

शब्दार्थ – १. सवतीचे पुत्र, २. मसलत, ३. वेदवाणी, ४. ऐकिले, गर्वामुळे, भले, हित व्हावे, ६. म्हणून, ७. नम्रपणे, ८. एकूणपन्नासदां, ९. राजगादी, १०. बंदी, ११. उपाय, १२. शपथ घेऊन, १३. शपथ, १४. वरांचे स्मरण.

सज्ञान तूं कुब्जे ॥४॥ मंथरा म्हणे कैकेयीसी । तुझेनि विजयो दशरथासी[1]। हात घातला रथांकासी । केंवी दुःखासी साहवलें ॥५॥ संग्रामीं रथचक्राचा लोट । तुझा बाहु व्हावा पीठ । कैसेनि धरवला नेट । तें मज स्पष्ट सांगा पां ॥६॥

कैकेयीला बालवयात अवमानित ऋषीकडून शाप व उःशाप : ऐकतां मंथरेचा प्रश्न । कैकेयी उल्लासे संपूर्ण । सांगे ऋषीचें शापवचन । आणि वरदान तयाचें ॥७॥ पितृगृहीं मज बाळपण। तेथें आला ऋषि सज्ञान । कुशासन कुशावरण । आणि आभरण कुशांचें ॥८॥ वृद्ध जटिल[2] रोमांचित । म्यां तेथें केलें वो अनुचित । वाकुल्या दाविल्या अति निंदित । तरी क्षमायुक्त महाऋषि ॥९॥ उगें देखोनियां ऋषींसीं । म्यां त्याचिये नाकीं लाविली मसी[3] । क्षोभ पावोनियां तापसी । अति आवेशीं शापिलें ॥११०॥ नानापरी तूं मज निंदिसी । ते तूं जगीं निंद्य होसी । उश्शाप मागावया त्यासी । बाळभावेंसीं मी नेणें ॥११॥ मसी लाविली माझे तोंडी । ते तूं जगीं होसील काळतोंडी । अपेशाची उभवोनि गुढी । निंद्यत्वें रोकडी नांदशील ॥१२॥ देवपूजा विसरला क्षोभोक्तीं । ते म्यां दिधली त्याचे हातीं । तेणें वदला तो वरदोक्ती । ऐक तुजप्रती सांगतें ॥१३॥ येणेंचि हातें भ्रतारासी । संग्रामीं तूं साह्य होसी । वरदद्वय पतीपासीं । तूं पावसी राजबाळे ॥१४॥ रथचक्रीं तुझा हात । संग्रामीं न होईल व्यथाभूत । होईल विजयी तुझा कांत । ऐसा वरदार्थ वदला ऋषि ॥१५॥ याउपरी मज आतां । पुढे काय कर्तव्यता । मंथरे सांगसी ज्या ज्या अर्था । तो तो तत्वतां मी करीन ॥१६॥

कुब्जेकडून कैकेयीला शिकवण : ऐकोनि कैकेयीचे बोल । कुब्जा विचार सांगे सखोल । तुवां कोप करावा प्रबळ । मुख्यत्वें केवळ रायावरी ॥१७॥ सांडोनिया दिव्याभरणांसी । मुक्तकेश मळिणवासी[4] । तुवां रिघावें प्रायोपवेशीं[5] । वरद्वयासी मागावया ॥१८॥ राजा येईल तुजपासीं । मुख न दाखवावें तयासी । कांही न बोलावें तयासीं । अति निश्चयेंसीं क्षोभवावें ॥१९॥ राजा देईल सुवर्णमेरू । अथवा रत्नांचा सागरू । तें तूं न करींच अंगीकारू । वरदविचारू सांडोनी ॥१२०॥ राज्यपट द्यावा भरता । वनवास द्यावा श्रीरघुनाथा। त्याही वनवासाची कथा । ऐक आतां सांगेन ॥२१॥ अयोध्येनिकट वनाआंत । वनवासी जालिया श्रीरघुनाथ । प्रजा समस्त जातील तेथ । उद्वसीं[6] भरत केवीं राजा ॥२२॥ राम अति प्रिय प्रजांसी । राम आवडे प्रधानांसी । अवघे जातील तयापासीं । मग भरतासी राज्य कैचें ॥२३॥ दंडकारण्य दूर देशीं । गंगातीरीं राम वनवासी । श्रीरामाची वार्ता अयोध्येसी । कदाकाळेंसीं न यावी ॥२४॥ अयोध्येची कथावार्ता । रामें नायकावी सर्वथा । ऐसें जालिया तत्वतां । राज्य भरता भोगेल ॥२५॥

मंथरेला इनाम : ऐकोनि मंथरेची युक्ती । उल्लास कैकेयीच्या चित्तीं । आलिंगली दोहीं हातीं । अति प्रीतीं सद्भावे ॥२६॥ रागें सांडिलें होतें पदक[7] । तें स्वयें लेववीलें देख । कानींची कुंडलें अमोलिक । दिधलीं आवश्यक अति प्रीतीं ॥२७॥ भरता अभिषेकिलियापाठीं । सुवर्णे मढीन तुझी पृष्ठी । रत्नखचित टिळक ललाटीं । घालीन कंठीं मुक्तामाळा ॥२८॥

कैकेयीचा क्रोधागारात प्रवेश : अनुमोदूनि मंथरेसी । कैकेयी निघाली प्रायोपवेशीं । सांडोनि अलंकारवस्त्रांसी । मळिणवासासीं भूमिशय्या[8] ॥२९॥ आता येवोनि दशरथ । पुसेल कैकेयीचा स्वार्थ । वना निघेल रघुनाथ । तोही कथार्थ अवधारा ॥३०॥ एकाजनार्दना

---

शब्दार्थ – १. रथाच्या कण्याला, आंसाला २. जटाधारी, ३. काळे, ४. मळकट वस्त्र नेसलेली, ५. मरण येईपर्यंत अन्नत्याग करावा. ६. ओसाड प्रदेशात, ७. अलंकार, ८. जमिनीवर निजणे.

शरण । देवकार्यार्थ संपूर्ण । वना निघेल रघुनंदन । दशवदनवधार्थ ॥१३१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां कैकेय्या मंथरोपदेशो नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥ ओंव्या ॥१३१॥ श्लोक ॥८॥ एवं ॥१३९॥

## अध्याय चौथा

### कैकेयी-दशरथ संवाद

॥श्रीरामचंद्राय नमः ॥

आज्ञाप्य तु महाराजो राघवस्याभिषेचनम् । उपस्थानमनुज्ञाप्य प्रविवेश निवेशनम् ॥१॥
प्रियार्हां प्रियमाख्यातुं विवेशांतःपुरं वशी । स कैकेय्या गृहं श्रेष्ठं प्रविवेश महायशाः ॥२॥
न ददर्श स्त्रियं राजा कैकेयीं शयनोत्तमे । स कामबलसंयुक्तो रत्यर्थी मनुजाधिपः ॥३॥
अपश्यन्दयितां भार्यां पप्रच्छ विषसाद च । नहि तस्य पुरा देवी तां वेलामत्यवर्तत ॥४॥
प्रतहारी त्वथोवाच संत्रस्ता तु कृतांजलिः । देव देवी भृशं क्रुद्धा क्रोधागारमभिद्रुता ॥५॥

अभिषेकाची सिद्धता, दशरथ कैकेयीच्या भवनात येतो, तेथील चमत्कारिक स्थिती : श्रीरामासी अभिषेकार्थ । प्रातःकाळीं पुष्य सुमुहूर्तें । सिद्ध सामग्री करावया समस्त । आज्ञा नेमस्त रायें केली ॥१॥ मग रतिकामसंभोगासीं । आला कैकेयीभवनासी । गृहीं न देखोनियां तिसी । पुसे समस्तांसी प्रिया कोठें ॥२॥ तेथें दास दासी सेवक । कोणी न बोलती रायासन्मुख । अवघीं राहिलीं अधोमुख[1] । तेणें साशंक नृप जाला ॥३॥ कुब्जा राहोनियां दुरी । खुणाविली छत्रधारी । ते रायातें नमस्कारी । भयभीत भारी बोलावया ॥४॥ तिसी नाभीकारयुक्त[2] । राजा पुसतसे वृत्तांत । ते म्हणे कैकेयी क्रोधें मूर्च्छित । अति संतप्त भोगत्यागें ॥५॥ सांडोनि वस्त्राभरणांसी । भूमिशय्या मळिणवासासीं । कैकयी होती तमःप्रदेशीं[3] । तेथें रायासीं तिणें नेलें ॥६॥

राजाची अस्वस्थता, कैकेयीचा अनुनय : देखोनि कैकेयीची अवस्था । परम दुःख झालें दशरथा । तुज काय कोणें केलें आतां । तें तत्वतां मज सांगें ॥७॥ तुज कोणें दाविला हात । त्याचा समूळ करीन घात । तुज बोलती जे विरुद्धार्थ[4] । जिव्हा सदंत छेदीन त्यांची ॥८॥ ज्यासी म्हणसी करा समर्थ । गजांतलक्ष्मी देईन तेथ । करावें म्हणसी ज्यासी निर्मुक्त । बंधनिर्मुक्त करीन मी ॥९॥ मी असतां शिरावरी । त्वां कां तोडिली गळसरी । भूमिशय्या प्रेतापरी । अशुभकारी हे चिन्ह ॥१०॥

कैकेयी राजाची निर्भर्त्सना करते : तिसी लावूं जातां हाता । तिणें झांजडिलें नृपनाथा । तिचें मुख पाहूं जातां । मुख सर्वथा ते दावीना ॥११॥ प्रिया पाहों नेदी वदन । रायासी आलें जी रुदन । धांवोनि तिचे धरिले चरण । प्रिये तुजवीण मी परदेशी ॥१२॥ येरी आसुंडिले[5] पाये । उठीं येथोनि परता जायें । मुख दाविसी काये । निर्लज्ज पाहें तूं एक ॥१३॥ सुणा[6] येतां सुणी वसवसी । कैकेयी दशरथासी तैसी । स्त्रीलोभाची दशा ऐशी । अपभ्रंशी[7] स्त्रीलोभु ॥१४॥ राजा दशरथ सूर्यवंशी । त्याची स्त्रीलोभें दशा ऐशी । इता पुरुष स्त्रियांच्या दासी । स्त्रीलोभापासीं हा बडिवारू[8] ॥१५॥ मज कायसी गळसरी । तू मज कैंचा शिरावरी । प्राण सांडीन उपराउपरी । तुझी मजवरी अति प्रीती ॥१६॥ राजा बोले प्रीतियुक्त । सांगे तुझे मनोगत । तें मी करीन समस्त । तुज कां अत्यंत क्रोध आला ॥१७॥

दोन स्त्रियांच्या पतीची केविलवाणी अवस्था : दोघीं स्त्रियांचा जो पती । त्यासी सत्यत्व नाहीं

---

शब्दार्थ - १. तोंड खाली करून, २. अभय देऊन, ३. अंधकारयुक्त जागेत, ४. वाकडे, ५. झटकले, झाडले, ६. कुत्रा, ७. अधःपात, करणारा, ८. मोठेपणा.

शास्त्रार्थीं । त्याची साक्ष साधु न मानिती । तुज मज प्रीती सत्य कैंची ॥१८॥ दोहीं स्त्रियांचा पति तो शठ । तूं तिघींचा अति पापिष्ठ । माझा अपमान करोनियां स्पष्ट । राज्यपट[१] कौसल्ये ॥१९॥ मज तुझिया अति प्रीतीं । स्वर्गीं इंद्रादिक पूजिती । ते माझी करोनि अप्रीती । कौसल्येप्रती राज्यपाट ॥२०॥

दशरथावर दोषारोप : तुवां मांडिलें मजसीं वैर मातुळा धाडूनि माझे कुमर । श्रीराम करिसी राज्यधर । कपटी साचार तूं एक ॥२१॥

दशरथाचे निराकरण : राजा म्हणे कैकेयीसी । तुंवाचि करोनि आग्रहासी । पुत्र धाडिले मातुळासी । शेखीं म्हणसी मज कपटी ॥२२॥ राज्याधिकार ज्येष्ठ पुत्रासी । तो केवी लाभे कनिष्ठासी । विवेक नाहीं तुजपासीं । व्यर्थ कां करिसी अति क्रोध ॥२३॥ अनधिकारीं[२] राज्याधिकारू । ब्रह्मा आलिया न शके करूं । तुज काय जाला भूतसंचारू । अति अविचारू क्रोध तुझा ॥२४॥

क्रोधमहिमा : क्रोध पित्यापुत्रातें बाधी । क्रोध स्त्रीपुरुषांसी विरोधी । क्रोध पित्याची प्रीती छेदी । क्रोध त्रिशुद्धीं[३] अनर्थ ॥२५॥ क्रोध निजज्ञाना निर्दाळी । क्रोध तापातें छळी । क्रोध स्वार्थाची करी होळी । क्रोध महाबळी अनर्थी ॥२६॥ क्रोध साहाकारी कामासी । शेखीं[४] क्रोध आलिया काम नाशी । क्रोध विवेकातें ग्रासी । तो तुजपासीं अति क्रोध ॥२७॥ तुज श्रीरामीं प्रीती त्रिशुद्धी । ते तुझी कोणे छळिली बुद्धी । दारुण उपजली दुर्बुद्धी । अति विरोधी श्रीरामीं ॥२८॥ विरोध करितां श्रीरामासीं । ऐहिकपरत्रातें[५] मुकसी । जगीं अत्यंत निंद्य होसी । हितोपदेशीं तुज सांगों ॥२९॥ माझी तुज समक्षा[६] भारी । वचन नुलंघिसी तिळभरी । ते तूं आजी मजवरी । अति धिक्कारीं जल्पसीं[७] ॥३०॥ तुझा झाला बुद्धिपालट । येथून तुज मज शेवट । अति दु:खाचा राज्यपट । पावस स्पष्ट अति क्रोधें ॥३१॥

उदकस्य रस: शैत्यमन्नस्य स्वादरो रस: । आनुकूल्यं रस: स्त्रीणां मित्रस्यावंचनं रस: ॥६॥

शीतळता ते उदकगोडी । मिष्टान्ना आदरें चवी गाढी[८] । अनादरें कोटि परवडी[९] । लागली पाडी विषाचिया ॥३२॥ अवंचकता[१०] परिपूर्ण । तेंचि मित्रत्वें गोडपण । वंचकता[११] जालिया जाण । मित्र मित्रपण विटंबिलें ॥३३॥

विकल्पाचे दुष्परिणाम : अनुकूलता स्त्रियांसी गाढी । तंव तंव स्त्रीपुरुषांची अति गोडी । जालिय विकल्पाची सवडी[१२]। तुटी रोकडी स्त्रीपुरुषां ॥३४॥ कैकेयी विकल्प धरिल्या पोटीं । स्त्रीपुरुषां पडे तुटी । तुझ्या कळवळ्याकरितां सांगतों गोष्टी । विवेक दृष्टिविचारें ॥३५॥ तुझी नव्हे ही सुबुद्धी । नेणों कोणें दिधली दुर्बुद्धी । क्रोध सांडोनिया त्रिशुद्धी । भोगसमृद्धी सुखें भोगीं ॥३६॥ श्रीराम सर्वांचा आवडता । तुज रामासीं एकात्मता । कोणें विकल्प घातला चित्ता । तो सांडीं सर्वथा कैकेयी ॥३७॥ तुझी मज प्रीती पूर्ण । जें मागसी तें देईन जाण । वाहतों श्रीरामाची आण । परम प्रमाण हें माझें ॥३८॥

कैकेयीचे हृदयपरिवर्तन : ऐकोनि रासाची हे गोष्टी । कैकेयी विकल्प सांडी पोटीं । भरत अयोग्य राज्यपटीं । मागता सृष्टी मी निंद्य ॥३९॥ अयोग्य मागता राज्यभार । मज निंदितील ऋषीश्वर । मरमर[१३] करितील लहान थोर । हा विचार अति निंद्य ॥४०॥

मंथरेने केलेली खूण, कैकेयीवर अनुकूल परिणाम : तें चिन्ह कळले मंथरेसी । म्हणे काय जालें इयेसी । घालोनियां विवेकासी । केली पिशाची नृपनाथें ॥४१॥ म्यां तव शिकविला

शब्दार्थ - १. राज्याधिकार, २. अनधिकारी व्यक्तीला, ३. निश्चये करून, ४. शेवटी, ५. भूलोकीचे व स्वर्गीचे सुखाला, ६. मर्यादा, ७. बडबडतेस, ८. उपचार, ९. तुलनेला, १०. सर बहार, ११. लबाडी, १२. संधी, १३. उपहास.

हितार्थ । परी ईस न कळी निजस्वार्थ । माझें शिकविलें गेलें व्यर्थ । अति चरफडित मंथरा ॥४२॥ दुष्टासी ऐकतां धर्मवार्ता[1] । अति क्रोध उपजे चित्ता । कैकयीमन द्रवलें देखतां । मंथरा तत्वतां कुसमुसी[2] ॥४३॥ आंतचे आंत हात चुरी । म्हणे आतां काय करी । राज्य दिधलें रामाकरीं । आम्हां रोकडी देशवटा[3] ॥४४॥ रामासी नाहीं माया जाण । आम्हांवरी निष्ठुर पूर्ण । त्यासी जालिया राज्याभिषिंचन । पुनरागमन नाहीं आम्हां ॥४५॥ तें संधी खुणावी मंथरा । म्हणे सोडूं नको पूर्वनिर्धारा । अन्यथा न करीं वो विचारा । दोन्हीं वरां मागें वेगीं ॥४६॥ मंथरा देखतांचि दृष्टीं । विकल्प बळावला पोटीं । मग रायासीं मांडिल्या गोष्टी । क्रोधदृष्टीं पाहूनी ॥४७॥

कैकेयी वरपूर्तीचे राजाला आव्हान देते : वाहिली श्रीरामाची आण । तें मज मानलें प्रमाण । मागेन तें द्यावें आपण । अन्यथा वचन न करावें ॥४८॥ तुम्हींच मज पूर्वी दिधलें । तेंचि मी मागेन आपुलें । राजा सुखावला येणें बोलें । मागें वहिलें[4] म्हणे तिसी ॥४९॥ तुम्हींच युद्धीं सुखावोन । दिधलें दों वरीं वरदान । तें मी मागेन आपण । कृपणपण न करावें ॥५०॥ राजा म्हणे आवश्यक । जें जें मागसी अलोलिक । तें तें मी तुज देईन देख । पूर्ण भाक पैं माझी ॥५१॥ सत्य न करितां पूर्वभाक । हांसतील हरिश्चंद्रादिक । पूर्वज शापितील आवश्यक । मजही नरक होईल ॥५२॥ कल्पतरु कामधेनु । पाताळींचें अमृतपान । जें जें मागसील तें देईन । सत्य संपूर्ण करीन मी ॥५३॥ असतां साह्य श्रीराम मजसी । काय दुर्लभ मज द्यावयासी । मग दशरथ अति उल्लासेंसीं । कैकेयीसीं तुष्टला ॥५४॥ भोळेपणाचेनि लवलाहें । राजा गर्जे उभवोनि बाहे । स्त्रियांचे कृत्रिम हृदय आहे । तें ठावें नव्हे पुरुषांसी ॥५५॥ संवचोराचा सांगात[5] । तैसा स्त्रियांचा वृत्तांत । सर्वस्वें ठकोनि करावा घात । नरककपात स्त्रीसंगें ॥५६॥ ऐकोनि रायाची वचनोक्ती । कैकेयी बोले रायाप्रती । मागेन माझिया वरदोक्ती । ऐकें निश्चितीं मागतें ॥५७॥

दोन वरांनी दोन हेतूंची पूर्ती : एकें वरदें भरतासी । स्वयें द्यावें निजराज्यासी । जैसा उल्लास रामाभिषेकासी । तेणें उल्लासीं अभिषेकी ॥५८॥ दुसऱ्या वरदें श्रीरामासी । धाडावें दंडकारण्यासी । गोदातीरीं वनवासी । चवदा वर्षे वनवास ॥५९॥ मज नाहीं अति स्वार्थ । चवदा वर्षें नेमस्त । राज्य करील माझा भरत । पुढे रघुनाथ राज्य करो ॥६०॥ चवदा वर्षांमाझारी । चवदा भुवनें भरत आंवरी । राम आलियाहीवरी । मग कैशापरी राज्य पावे ॥६१॥ वनीं दंडकारण्यांत । राक्षसांचा अति घात । ते गिळतील रघुनाथ । मग राज्यीं भरत अक्षयी ॥६२॥ रामासवें गेल्या लक्ष्मण । त्याचेंही राक्षस करितील भक्षण । तेव्हां निष्कंटक राज्य पूर्ण । भरत आपण भोगील ॥६३॥ दृढ विचार हा पोटांत । संबोधावया दशरथ । चवदा वर्षे जीं नेमस्त । स्वयें सांगत मर्यादा ॥६४॥ अयोध्यानिकटप्रदेशीं । श्रीराम जालिया वनवासी । अयोध्या जाईल त्यापासीं । मग भरता उद्वसीं[6] राज्य कैचें ॥६५॥ राम आवडे प्रजांसी । राम आवडे प्रधानांसी । राम आवडे सर्व सैन्यासी । ते त्यापासीं जातील ॥६६॥ रामापासीं जातील समग्र । मग अयोध्या ओस नगर । तेथे भरत राज्यधर । हा मिथ्या विचार समूळ ॥६७॥ यालागीं दंडकारण्यासी । अवश्य धाडावें श्रीरामासी । गोदातीरीं वनवासी । वल्कलांबरेंसीं रहिवासु ॥६८॥ राज्यामधील अणुप्रमाण । श्रीरामासी न द्यावें आपण । जटाधारी वल्कलपरिधान । करावें गमन गोदातीरीं ॥६९॥

असंगसंगदोषेण साधवो यांति विक्रियाम् । एकरात्रप्रसंगेन काष्ठघंटाविडंबना ॥७॥

---

शब्दार्थ - १. विचाराची गोष्ट, चरफडू लागली, २. देशोधडी, ३. देशत्याग, ४. लवकर, ५. समजुतीसाठी, ६. ओसाड प्रदेशी.

ओढाळ धेनूच्या संगतीं । धर्मधेनु चरतां शेतीं । ओढाळ पळे अतर्क्यगती । धर्मधेनूप्रती लोढणें ॥७०॥ तैसें कैकेयीपाशीं जाण । मंथरेचें आप्तपण । भरतराज्याचें भूषण । लोढणें संपूर्ण वैधव्याचें ॥७१॥ अवगणोनिया[1] निजपती । द्वेष करिता श्रीरघुनाथीं । पावेल वैधव्याची प्राप्ती । दुष्टसंगतीचें ऐसें फळ ॥७२॥

वरपूर्तीचा हट्टाग्रह पाहून राजा मूर्च्छित : असो हा अति कथार्थ । ऐकतां कैकेयीवचनार्थ । दशरथ धरणीं पडे मूर्च्छित । अवस्था प्राणांत ओढवली ॥७३॥ श्रीरामवियोगाचे बाण । हृदयीं खडतरले[2] दारुण । अर्धकंठीं धरिला प्राण । श्रीरामदर्शन घ्यावया ॥७४॥ कैकेयीचें वचन वज्र । रामवियोग सतेज धार । मरणांत घाव लागला थोर । घायें नृपवर मूर्च्छापन्न[3] ॥७५॥ ऐसा अंतरीं विव्हळ । रामवियोगाची तळमळ । नेत्रांवाटे वाहे जळ । स्वेद[4] प्रबळ चालिला ॥७६॥ अंगी घाव न देखे वैद्य । यालागीं न चलें औषध । अंतरीं खोंचला सुबद्ध[5] । पोटीं अशुद्ध[6] दृढ पडिलें ॥७७॥ राजा होवोनि सावधान । म्हणे मी काय देखतां दुष्ट स्वप्न । श्रीराम सर्वांचे जीवन । त्यासी वनप्रयाण कोण नेमी[7] ॥७८॥ कैकेयीची मज आवडी । तेचि मोहक मद्य उघडी । श्रीराम वनवासा दवडी । प्रिय प्रियाधाडी मज आली ॥७९॥

स्त्रीलोभामुळे दशरथाला पश्चाताप : स्त्री वल्लभा आप्तपण । जो मानी तो मूर्ख पूर्ण । श्रीरामासी वनवासप्रयाण । आली नागवण स्त्रीलोभें ॥८०॥ पुरेषें प्रलोभें[8] न द्यावी भाक। स्वयें मागणें नाही तें देख । संधि साधोनियां अटक[9]। नरकदायक मागणें ॥८१॥ दुष्ट दुर्धर स्त्रीचरित्र । सर्वदा बोलतें वेदशास्त्र । तें मी न मानोनि पामर । जालों पात्र अति दुःखा ॥८२॥ जेंवी उच्छिष्टें पाळिजे श्वान । तैसा मी जालों स्त्रियांचे अधीन । तें फळ पावलों संपूर्ण । वनाभिगमन श्रीरामा ॥८३॥

कैकेयीवर राजा संतापतो : पाहोनि कैकयींचे वदन । रायासी आला क्रोध दारुण । नष्टे दुष्टे दुर्भगे जाण । द्वेषी संपूर्ण श्रीरामीं ॥८४॥ रामें काय केला अपराध । त्यावरी तुझा दुर्धर क्रोध । दंडकारण्य अति विरुद्ध । भाषनिर्बंध वनवासा ॥८५॥ भरतापरिस अति प्रीती । श्रीरामावरी तुझी होती । कोणें विकल्प घातला चित्तीं । श्रीरामप्रति अति द्वेष ॥८६॥ कौसल्येपरिस अधिक । श्रीराम तुझा निजसेवक । सेवा करोनि अवंचक[9] । त्यासी तूं दुःख देवों पाहसी ॥८७॥ माझी घेवोनियां भाक । मजचि देवों पाहसी दुःख । जळो तुझें काळें मुख । दुःख तें सुख मानिसी ॥८८॥ श्रीराम परमात्मा परेश । त्याचा तू करितां द्वेष । होईल सर्वस्वाचा नाश । पावसी त्रास निंदेचा ॥८९॥

कैकेयीला विनवणी : ना भरत ना श्रीराम । ऐसें होईल विरुद्ध कर्म । यालागीं करीं वो उपशम । द्वेष दुर्गम सांडोनी ॥९०॥ श्रीरामीं सांडीं दुष्टपण । यालागीं धरितों तुझे चरण । वरदानाचें दृढपण । क्षमा संपूर्ण मज कीजे ॥९१॥

तिचा सत्यपरिपालनाचा आग्रह, पूर्वेतिहास : ऐकोनि रायाचें वचन । कैकेयी म्हणे होसी सर्वज्ञ । सूर्यवंशीं वरदान । मिथ्या वचन नाहीं केलें ॥९२॥ स्वप्नींचें वरदान नरेंद्रे । सत्य केलें हरिश्चंद्रें । आपणासकट स्त्रीपुत्रें । विकोन खरें वरद केलें ॥९३॥ नपुंसक तूं सूर्यवंशीं । राम न धाडवे वनवासासी । उणें आणिलें पूर्वजांसी । दिधले भाकेसी नेदूनी ॥९४॥ कपोताच्या वरदानासी । शिबीनें तुकिलें निजमांसासी । सत्य करोनि वचनासी । वैकुंठासी नेली नगरी ॥९५॥ राजा रुक्मांगद अयोध्येसी । धर्मांदग पुत्र तयासी । तेणें जिंकोनि सप्तद्वीपांसी । नाना

---

शब्दार्थ - १. न जमानून, २. रुतले, ३. मूर्च्छित, ४. घाम, ५. अत्यंत, ६. रक्त, ७. ठरविणार, ८. प्रतिबंधक, ९. निष्कपट.

अर्थ पितयासी । सद्भावेंसीं अर्पिलें ॥९६॥ पृथ्वी समुद्रवलयांकित । धर्मांगद पितयासी एकचि सुत । पितृसेवनार्थ[1] अति उदित । आणि हरिभक्त सर्वस्वें ॥९७॥ मोहिनीच्या वरदासीं । पिता वधी धर्मांगदासी । नगरी नेली वैकुंठासी । एकादशीव्रताच्या प्रतापें ॥९८॥ तेंचि वंशीं तूं दशरथा । वना न धाडवे रघुनाथा । वरद न देववे म्हणसी आतां । हे नपुंसकता तुजचि साजे ॥९९॥ स्त्रीवाक्य अति तीक्ष्ण । ऐकतां निवटे जीव प्राण । राजा पडला मूर्च्छापन्न । संज्ञा संपूर्ण बुडाली ॥१००॥ स्त्रीविषय विष संपूर्ण । दुर्धरत्वें अति दारुण । सेविलिया अवश्य आणी मरण । तें संपूर्ण कैकेयीनें केलें ॥१॥

**कैकेयीला पुनः प्रार्थना :** राजा अति दुःखें मूर्च्छापन्न । तो स्वयें पावोनि संज्ञा संपूर्ण । कैकेयीप्रति आपण । विनीत कारुण्यें बोलत ॥२॥ श्रीरामीं तुझी कृपा पूर्ण । तेथें अत्यंत कठिणपण । धरावया तुज काय कारण । अति दारुण निर्दयत्वें ॥३॥ सुंदर सुकुमार सुखैकघन । श्रीराम हा राजीवनयन । त्यासी चरणचालीं गमन । दुर्धर वन केंवि कंठे ॥४॥ सुखवासी श्रीरघुवीर । त्यासी परिधान वल्कलांबर । शीत उष्ण अति दुर्धर । श्रीरामचंद्र केंवि साहे ॥५॥ मृदु अरुवार[1] सुखसेजेसीं । सुमनें खुपती श्रीरामासी । तृणपर्णी[2] शयनासीं । कैसेनि सोसील श्रीराम ॥६॥ पंचामृत अति चोखटें । सेवितां श्रीरामाचें मन विटे । त्यासी तिखट आंबट तुरटें । फळें मुळें कडवटें केंवि खाये ॥७॥ सेना प्रधान सेवक आप्त । तेणेंसीं विचरे श्रीरघुनाथ । तो एकला वनांत । चौदा वर्षें केंवि राहे ॥८॥ जळो माझें काळें वदन । प्रमादी[3] प्रमदागुप्तवरदान[4] । श्रीराम लागलें दृढ बंधन । म्हणोनि रुदन करी रावो ॥९॥

**रामवनवासाने होणारे दुष्परिणाम :** श्रीरामाचें वनप्रयाण । त्या सांगातें जाईल लक्ष्मण । त्यासवें जाईल माझा प्राण । सत्य जाण कैकेयी ॥११०॥ दुःखें कौसल्या त्यजील प्राण । सुमित्रा मरेल सत्य जाण । येवढें जालिया कंदन । सुखसंपन्न तूं होसी ॥११॥ दुर्धर करोनियां आकांत । राज्यीं स्थापूं पहासी भरत । येवढा न करीं तू अनर्थ । शरणागत मी तुझा ॥१२॥ म्हणोनि चरणीं ठेविला माथा । क्षमा करीं मज दशरथा । न मागावी हे वरदकथा । वना रघुनाथा न दवडावें ॥१३॥ राम असों दे मजपासीं । राज्य देतों मी भरतासी । प्रतिभू[5] देतों वसिष्ठासी । तो आम्हांसी नियंता ॥१४॥

**राजाचे लोटांगण व कैकेयीकडून धिक्कार :** म्हणोनि घातलें लोटांगण । धरिले मस्तकीं तिचें चरण । तंव ते क्षोभली दारुण । म्हणे शठा नष्टपण कां करिसी ॥१५॥ अति हीन दीन तूं होसी । लाज लाविली सूर्यवंशासी । बोलिला बोल पैं सांडिसी । कृपण होसी नृपनाथा ॥१६॥ पायां पडलियासाठीं । मी न सांडीं वरदगोष्टी । देणें नाहीं तुझे पोटीं । महाहट्टी होसी राया ॥१७॥ तूं तंव न देसी वरदान । मज म्हणसी महाविघ्न । तरी मी आपुला देईन प्राण । सुख संपूर्ण हो तुम्हां ॥१८॥ माझा हाचि परमार्थ । सुखी व्हावा निजकांत । माझा करोनियां घात । सुखी दशरथ हो येथें ॥१९॥ वरदभाष्य करितां मिथ्या । माझी तुजवरी पडेल हत्या । मग तूं अभिषेकीं रघुनाथा । सुख समस्तां होईल ॥१२०॥

**राजाची विकट स्थिती :** अति उग्र कैकेयीचें वचन । तेणें रायासी आलें रुदन । सवेंचि पडे मूर्च्छापन्न । भ्रमे मन रायाचें ॥२१॥ देशोदेशींचे भूपती । आणिले रामाभिषेकार्थी । ते मज दिगंतीं[6] निंदिती । स्त्रीवंश स्त्रीजित दशरथ ॥२२॥ प्रधानादि जन समस्त । घरोघरीं निंदिती

---

शब्दार्थ - १. नाजुक, २. गवत, पाने, यावर, ३. मोह पाडणारे, ४. स्त्रियांना गुप्तवचन देणे, ५. जामीन, ६. चार दिशास, सर्वत्र.

बहुत । निंदापात्र मी निश्चित । वना रघुनाथ दवडितां ॥२३॥ कैकेयीचें परम सुख । इहलोक ना परलोक । जगा द्यावया परम दुःख । सुंदरी परम विख कैकेयी ॥२४॥ कैकेयी केवळ काळराती । म्या पाळिली अति प्रीतीं । ते माझी भोवली मजभोवतीं । म्यां कोणाप्रती सांगावें ॥२५॥ राम धाडावया वनाप्रती । वचनें तळमळितां भूपती । दुःख सोसितां सरली रीती । उदयप्राप्ती होऊं पाहे ॥२६॥ प्रबोधितां[1] श्रीदशरथ । कैकेयी करील विपरीत । वधावया राक्षस समस्त । वना श्रीरघुनाथ निघेल ॥२७॥ एकाजनार्दना शरण । कथारम्य[2] रामायण । श्रोतीं द्यावें अवधान । वनप्रयाण श्रीरामा ॥१२८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां कैकेयीदशरथसंवादो नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ ओंव्या ॥१२८॥ श्लोक ॥७॥ ॥ एवं १३५ ॥

## अध्याय पाचवा

### दशरथभवनात श्रीरामांचे आगमन

श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।

प्रभाते शर्वरीं दृष्ट्वा चंद्रनक्षत्रमंडिताम् । ततः सूतो यथाकालं पार्थिवस्य निवेशनम् ॥१॥
प्रविवेश प्रबोधार्थं सुमंतो मतिसत्तमः ॥२॥

प्रातःकाळी सुमंत दशरथास उठविण्यास गेला : अभिषेकावया श्रीरघुनाथ । प्रातःकाळीं सुमुहूर्त । चंद्र देखोनि गुरुपुष्ययुक्त । वेगीं सुमंत ऊठिला ॥१॥ सुमंत प्रधान बुद्धिमंत । प्रबोधावया श्रीदशरथ । आला राजभवनांत । कैकेयीयुक्त नृप जेथें ॥२॥

दशरथाची काळजी : अभिषेकावया रघुनंदन । राया होई सावधान । ऐकोनि प्रधानाचें वचन । मूर्च्छापन्न दशरथ ॥३॥ राम जाईल वनांत । कोणते तोंडी बोलूं मात । हातींचा जाईल रघुनाथ । दुःखें मूर्च्छित दशरथ ॥४॥ वना धाडितो दशरथ । ऐसी ऐकतांचि मात[3] । वचन नुल्लंघीच रघुनाथ । जाईल वनांत तत्काळ ॥५॥ रामासी नाहीं राज्यचाड[4] । नाहीं विषयांचे कोड । माझें वाक्य अति गोड । घेईल ओढ वनवासा ॥६॥ वना धाडितों ऐसी गोष्टी । काना वचना होतां भेटी । वना निघेल तो उठाउठीं । जगजेठी श्रीराम ॥७॥ वनवासाची हे कथा । कानीं ऐकतां रघुनाथा । वना निघेल तत्वतां । त्यासी मी आतां काय करूं ॥८॥ विशेषें माझी भाक । मिथ्या न करील रघुकुळटिळक । वना जाईल आवश्यक । दुःखशोक दशरथा ॥९॥ कैकेयी तंव आहे खोटी । हट्टें विस्तारील हे गोष्टी । पाडील श्रीरामासीं तुटी । दुःखे सृष्टी मूर्च्छित ॥१०॥

रामास बोलाविण्याविषयी कैकेयीची सुमंतास आज्ञा : कैकेयी म्हणे सुमंताप्रती । रायासी लागली सुषुप्ती । वेगीं आणावा रघुपती । आज्ञा मजप्रति रायाची ॥११॥ ऐसी कैसी हे सुषुप्ती । क्षितितळीं लोळे भूपती । मिथ्या मानोनियां चित्तीं । निघे मागुती सुमंत ॥१२॥ तंव अभिषेकसामग्री । सभामंडपाच्या द्वारीं । स्वयें वसिष्ठ विस्तारी । नानापरी उपचार ॥१३॥

अभिषेकाची सर्व तयारी करण्याची वसिष्ठांची सुमंताला अनुज्ञा : वसिष्ठ म्हणे सुमंतासी । सर्व सामग्री सांगें रायापासी । वेगीं बोलावीं तयासी । अभिषेकासी सुमुहूर्त ॥१४॥ सदाफळी औदुंबर । त्याचे भद्रपीठ[5] मनोहर । केलें असे अति सुंदर । श्रीरामचंद्रअभिषेका ॥१५॥ भद्रीं व्याघ्रचर्म अहत[6] । समग्रही नखपुच्छयुक्त । सिंहासनीं विराजित । वरासनार्थ श्रीरामा ॥१६॥ सुवर्णकुंभ शतानुशत । दीर्घ वसंडे[7] वृषभ श्वेत । सुवर्णशृंगी क्षीरयुक्त । वस्त्रें अहत अति शुद्ध

शब्दार्थ – १. जागा करताच, २. कथांनी रमणीय, ३. गोष्ट, ४. राज्याची इच्छा, ५. सिंहासन, ६. अखंड, ७. वशिंडाचे.

॥१७॥ सिंधुसंगम सुधासंगम । गंगायमुनात्रिवेणीसंगम । जळें आणिलीं पवित्र परम । रघूत्तमअभिषेका ॥१८॥ सप्त[1] कुश सप्त[1] मृत्तिका । सप्त ऋषी आणिले देखा । चतुःसमुद्रींच्या उदका । अभिषेका आणिलें ॥१९॥ श्वेताश्वशार्दूळ[2] रथ । चंद्रोपम छत्र श्वेत । श्वेत चामरें रत्नजडित । सुशोभित व्यजनें[3] ॥२०॥ गोरोचनहरिद्रागौरव । क्षीरचूतपल्लव[4] पद्मपल्लव[5] । तोरणें बांधिलीं अति अपूर्व । राजे सर्व तिष्ठती ॥२१॥ दधिमधुघृताक्षतायुक्त । पूर्ण कलश सालंकृत । अष्टकन्या दानार्थ । उभ्या तिष्ठती अभिषेका ॥२२॥ मुकुट कुंडलें रत्नमेखळा । बाहुअंगदें कंठमाळा । सिद्धसामग्री या सकळा । ब्राह्मेळा तिष्ठतसे ॥२३॥ बाहेरी येवोनि आपण । अभिषेकावा रघुनंदन । हे वसिष्ठाची आज्ञा पूर्ण । केलें नमन सुमंतें ॥२४॥ ऐकोनि वसिष्ठाचें वचन । राजा जाला अति उद्विग्न । केवीं दावूं काळें वदन । मूर्च्छापन्न अति दुःखी ॥२५॥

**कैकेयी सुमंताला वरांचा वृत्तांत सांगते :** देखोनि रायाची अवस्था । कंप सुटला सुमंता । कैकेयी सांगे समूळे वार्ता । म्हणे राव कां वृथा दुःख मानी ॥२६॥ पूर्वी दिधलें मज भाकेसी । भरता राज्य राम वनवासी । तेंचि मागतां रायासी । अति दुःखासी कां मानी ॥२७॥ निश्चय जाण तूं सुमंता । राज्यपट माझिया भरता । दंडकारण्य श्रीरघुनाथा । भाक अन्यथा मी न करीं ॥२८॥

**सुमंताकडून धिक्कार :** ऐकतां कैकेयीची वाणी । सुमंत मूर्च्छित पडे धरणीं । कपाळ पिटी आक्रंदोनी । काय पापिणी वदलीस ॥२९॥ राम परम प्रिय समस्तां । जीवाहूनि आवडता । त्या तुज द्वेषितां रघुनाथा । अभाग्यता पैं आली ॥३०॥ इचें वचन अति अनर्थ । इसीं रायें करावा घात । वना दवडितां रघुनाथ । अति आकांत होईल ॥३१॥ येरी म्हणे पूर्वीची भाक । न देतां रायासी होय नरक । सुमंता ओढवलें अति दुःख । अधोमुख विलपत ॥३२॥ तयासी संबोखी[6] दशरथ । म्हणे हें बाहेर कळों नेदीं मात । वेगीं पाचारीं श्रीरघुनाथ । मग वृत्तांत कळेल ॥३३॥

**सुमंताचे रामभवनात आगमन, भवनवर्णन :** सुमंत वेगें राजाज्ञेसीं । आला श्रीरामभवनासी[7] । शोभा शोभे वैकुंठासीं । लाजे त्यासी कैलास ॥३४॥ भवनीं मयूर नृत्य करिती । तेणें तांडव विसरे उमापती[8] । मधुर पारवे घुमघुमती । चमके चित्तीं सामवेद ॥३५॥ पारव्यांच्या पीयूषवाणी[9] । गंधर्व ठेले वेडावोनी । चारी वेद जाले मौनी । श्रीरामभवनीं आल्हाद ॥३६॥ श्रीरामाच्या भवनाप्रती । शुक सुभाषित बोलती । वेदांत वेडावले किती । रस सेविती उपनिषदें ॥३७॥ सारिका[10] गोड बोलती । तेणें लाजे सरस्वती । विस्मयो मानी बृहस्पती । पक्षी पक्षार्थी परमार्थी ॥३८॥ रस स्रवती द्राक्षघड । तो रस सर्वांहूनि गोड । सचाड[11] तेणें होय निचाड । पुरे कोड मुमुक्षूंचें ॥३९॥ रामागणींच्या कमळिणी । कमळा[12] लाजे त्यातें देखोनी । माझा रहिवास चरणीं । हृदयाभरणीं शोभती ॥४०॥ श्रीरामभवनींचें सुमन । सुवासें होय मन उन्मन । तेणें सुवासें पांगुळे पवन । राहे मिळोन चिद्रूपीं ॥४१॥ पताका श्रीराममंदिरीं । झळकताती चिदंबरीं । जो कां लक्षी त्यांची थोरी । चराचरीं तो धन्य ॥४२॥ चूतवृक्ष[13] राजभवनांत । अवघे जाले जी अच्युत[14] । सफळ जाले अति विनीत[15] । फळें त्यागीत परिपाकें ॥४३॥ पारिजात स्वर्गसुवासें । पायीं लोळती कोणी न पुसे । श्रीराममंदिरांचीं माणसें । अवघीं उदासें तयांसीं ॥४४॥ सप्तावरण सप्त दारवंठे । द्वारपाळ सज्ञान मोठे । कळिकाळातें

---

शब्दार्थ - १. सात प्रकारचे दर्भ, २. उत्तम शुभ्र घोडे जोडलेला, ३. पंखे, ४. वड व आंबे यांचे टाळे, ५. कमलपत्रे, ६. सांत्वन करी, ७. रामाच्या मंदिरात, ८. शंकर, ९. अमृतसमान मधुर वाणीने, १०. मैना, ११. सलोभ, १२, लक्ष्मी, १३. आम्रवृक्ष, १४. नाशरहित, १५. वाकलेले.

मारिती सोटे । ऐसें लाठे[1] प्रतापी ।।४५।। देखोनि द्वारपाळाचा वेत । कृतांत चळचळां कांपत । काळ कामारा[2] पैं होत । श्रीरघुनाथ सेवावया ।।४६।। श्रीराममंदिर देखतां देख। सुमंतासी परम हरिख । मागील विसरला दु:ख । परम सुख पावला ।।४७।।

सप्तद्वारांचे पारमार्थिक रूपक : रथ सांडोनि पहिले द्वारीं । छत्रचामरें दुसरें द्वारीं । (पादत्राण तिसरे द्वारीं । त्यजोनि नरीं जाईये ।।) पादत्राणादि सामोग्री । तिसरे द्वारीं पैं राहे ।।४८।। चौथे द्वारीं सांडित अर्थ । पांवचें द्वारीं नि:शेष स्वार्थ । सहावे द्वारीं साधनें समस्त । स्वयें राहती सर्वही ।।४९।। सांडोनि मीतूपणाचा सांगात । रिघावें द्वाराआंत । तैंचि भेटे श्रीरघुनाथ । मुख्य परमार्थ या नांव ।।५०।। भावार्थ तें राजभवन । प्रथम दारवंटा तें श्रवण । दुसरे द्वारीं ते साधन । नित्यानित्य ज्ञान तें तिजें ।।५१।। चौथा दारवंटा तें मनन । पांचवा तो निदिध्यासन । सहावा तो वैराग्य पूर्ण । सातवा तो जाण साक्षात्कार ।।५२।। याचि मार्गाचे परिपाटी[3] । श्रीरामासीं होय भेटी । भरलिया जीवां आव्हाटी[4] । वाजती पाठीं यमदंड ।।५३।।

श्रीरामस्वरूपवर्णन : असो अतिशयें हा कवितार्थ । पुढें चालवावा ग्रंथ । पाचारावया श्रीरघुनाथ । आला सुमंत सवेग ।।५४।। अंतरशुद्ध तो सुमंत । आला सातवे द्वाराआंत । तेणें देखिला श्रीरघुनाथ । स्वरूपार्थ अनुपम्य ।।५५।। राजीवलोचन घनसांवळा । आजानुबाहु अति विशाळा । मुकुटकुंडलें विचित्रमाळा । अनर्घ्य गळां निजपदक ।।५६।। वीज लागोनि कांसेसी । जावों विसरली अस्तासी । तैसा पीतांबर तेजेंसी । कटिप्रदेशीं लखलखित ।।५७।। सांवळे अंगीं सुगंधी उटी । बाहुभुषणें बाहुवटीं । टिळक पिंवळा ललाटीं । देखतां दृष्टीं मन निवे ।।५८।। पीतांबर परिधान । कंठीं मेखळा विराजमान । देखतां हरे भूकतहान । आनंदघन श्रीराम ।।५९।। वांकी अदुवांचा[5] गजर । चरणीं गर्जती तोडर । सुवर्णपर्यंकीं श्रीरघुवीर । आल्हाद थोर सुमंता ।।६०।। सौंदर्याची नि:सीम सीमा । सीता सेवी श्रीरामा । लक्ष्मीकांता जैसा रमा । तैसा प्रतिमा शोभत ।।६१।।

दशरथाच्या बोलण्यावरून त्याच्याकडे श्रीरामांचे जाणे, परिवारवर्णन : ऐसा देखोनि रघुवीर । सुमंतें केला नमस्कार । तुझे भेटीसी नृपवर । अति सादर एकांतीं ।।६२।। ऐकोनि सुमंताचें वचन । सीता बोले सुहास्यवदन । करावया राज्याभिषिंचन । रायें प्रधान पाठविला ।।६३।। ऐकोनि पितयाचें आज्ञावचन । शीघ्र उठिला रघुनंदन । सीतेनें करोनियां नमन । निराजन त्यासी केलें ।।६४।। श्रीराम द्वारांतरीं येत । सुमंतें शीघ्र आणिला रथ । त्यावरी बैसविला रघुनाथ । जैसा भास्कर तेजस्वी ।।६५।। लक्ष्मण जाला छत्रधारी । चामरें सुमंताचे करीं । श्रीराम निघाला बाहेरी । जयजयकार घन गर्जे ।।६६।। पुढं वीर वेत्रपाणी । लागल्या वाजंत्र्यांच्या ध्वनी । राजें जे कां मुकुटमणी । लागती चरणीं श्रीरामाचे ।।६७।। पाठीशीं रथांचे घडघडाट । वरी युवराजे श्रेष्ठ श्रेष्ठ । दोहीं बाहीं कुंजरथाट । पुढें उद्भट महावीर ।।६८।। असिवारांचे[6] पैं थवे । वारु नाचती अति लाघवें । महामांडलिकांचे यावे । जयजयकारें गर्जती ।।६९।। अश्वगजरथांचें भार । चालती पायांचें मोगर[7] । हैकार थैकार जयजयकार । सेनासंभार चतुरंग ।।७०।। ध्वजा पताका अपार । डोलती श्रीगिरिसंभार । सिंहनाद करिती वीर । भाट कैवार वानिती ।।७१।। नगरनागरिक लोक । हर्षें बोलती सकळिक । रायें श्रीराम पाचारिला देख । राज्याभिषेक करावया ।।७२।। हेचि वार्ता घरोघरीं । स्वयें बोलती नरनारी । राम जातो निजगजरीं । राज्याधिकारी व्हावया ।।७३।। मार्ग शिंपिले सुगंधें । तोरणें मखरें नानाविधें।

---

शब्दार्थ - १. मोठे, २. दास, कामकरी, ३. क्रमाने, ४. वाकडा रस्ता, ५. घागऱ्यांचा, ६. घोडेस्वारांचे, ७. पायदळ.

नगर शृंगारिलें विनोदें । परमानंदे आल्हाद ॥७४॥ मुंडपघसणी[1] होत भारी । एक चढले माडियागोपुरीं । एक पाहाती गवाक्षद्वारीं । आवडी भारी श्रीरामीं ॥७५॥ आल्हाद नगरामाझारीं । गुढिया उभविल्या घरोघरीं । सदीप बलिदानें करीं । नरनारी ओंवाळिती ॥७६॥ पाहतां श्रीरामाचें मुख । परमानंदें होतसे सुख । डोळिया लागली टकमक । नावडे आणिक दृष्टीसी ॥७७॥ लवों विसरलीं नेत्रपातीं । प्राण पांगुळ झाला निजगती । सर्व इंद्रियां एकवृत्ती । श्रीराममूर्ती देखोनि ॥७८॥ सादरें पाहतां रघुपती । आनंदें कोंदली त्रिजगती । नाठवे देहगेहस्फूर्ती[2] । श्रीराममूर्ती देखोनी ॥७९॥ देखतां श्रीरामाचें मुख । निःशेष निमालें पें दुःख । तिहीं लोकीं न माये सुख । हर्षें हरिख कोंदाटे ॥८०॥ देखोनियां श्रीरामवदन । जीव विसरे भूकतहान । आनंदे निवती नयन । रघुनंदन देखोनी ॥८१॥ पाहतां श्रीरामस्वरूप । नाम निरसी पुण्यपाप। तत्काळ जातीं त्रिविध ताप । सुखस्वरूप श्रीराम ॥८२॥

श्रीरामांना आलेले पाहून राजाची अवस्था : नाना ध्वनींची वाजंतरीं । श्रीराम येतां निजगजरीं । ऐकोनि राजा रुदन करी । म्हणे कैसेपरी मुख दावूं ॥८३॥ जगासी श्रीरामाचें सुख । तेणें दशरथा परम दुःख । त्याचें पाहूं न शके मुख । पाडिली अटक[3] कैकेयीयें ॥८४॥ श्रीराम निववी सर्वांसी । तेणें अति ताप दशरथासी । कैकेयीनें पाडिलें अति भ्रांतीसी । निजभाकेसीं गोंवोनि ॥८५॥ स्त्रीचरित्र अगम्य सृष्टीं । निजवरदाचे नेटपाटीं[4]। पित्यापुत्रां पाडिली तुटी । उठाउठी कैकेयीयें ॥८६॥ दारुण स्त्रियांचें विंदान[5] । श्रीरामासी वनप्रयाण । तेंचि दशरथासी मरण । नाडिली आपण वैधव्यें ॥८७॥ ऐसें जाणोनि दशरथ । अतिशयेंसीं विलपत । तंव तेथें पातला श्रीरघुनाथ । समवेत सौमित्र ॥८८॥

श्रीरामांनी येताच दशरथ-कैकेयीला प्रणिपात : नमस्कारोनि दशरथा । कैकेयीचरणीं ठेविला माथा । म्हणे विजयी होई बा रघुनाथा । वाग्देवता सत्य वदे ॥८९॥ कैकेयीआशीर्वाद-गोष्टी । रामें बांधिली शकुनगांठी । विजयी जालों मी सृष्टीं । बाहे थापटी स्वानंदें ॥९०॥ उल्लास देखोनि रघुनाथा । दारुण मूर्च्छा आली दशरथा । श्रीरामवियोगाची अवस्था । कांही सर्वथा बोलवेना ॥९१॥ छेदावया दशकंठ । मुहूर्त सांगे वसिष्ठ । अयोध्याराज्य तें कनिष्ठ । रामराज्य श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥९२॥ श्रीरामासी संभाषण । रायास न करवे जाण। कैकेयीयें केलें मुखमुद्रण[6] । वनाभिगमन न सांगवे ॥९३॥ न बोलवे येथें राहें । न बोलवे वनासी जायें । देखोनि श्रीरामाचे पाये । दुःखी होये अति दुःखें ॥९४॥ बाष्पें रोधिला निजकंठ। घोर वाजे घरघराट। टंवकारिले नेत्रवाट[7] । व्यथा उद्भट रायासी ॥९५॥

रामाची कैकेयीला प्रार्थना : राजा देखोनि व्यथाभूत । कैकेयीसी पुसे रघुनाथ । कैसेनि ताप जाला अद्भुत । किंवा भूतसंचारू ॥९६॥ अथवा माझी अपराधता । घडली असे मज नकळतां । कीं कांहीं भरते धाडिली वार्ता । की शत्रुघ्नें बोलतां अन्याय केला ॥९७॥ तरी नव्हे देहतापाची निष्ठा । नव्हे भूतसंचाराचा ताठा । नव्हें त्रिदोषाचा फांटा । नृपवरिष्ठा कोण व्यथा ॥९८॥ दैविक दैहिक[8] किंवा मानसिक । अथवा कांही आहे अलौकिक । रायासी कवणेपरी दुःख । तुज सम्यक पुसतों ॥९९॥ धाडोनि सुमंत प्रधान । रायें बोलाविलें जाण । त्या मज कोण आज्ञापन । तेंही आपण पुसावें ॥१००॥

---

शब्दार्थ - १. खंदळारवंदळ, मनुष्य चेंगरून जाईल इतकी अलोट गर्दी, २. शरीर व घर यांचे स्मरण, ३. बंदी, ४. अट्टाहासाने, बळाने, ५. कर्तृत्व, महिमा, ६. मुखबंधन, ७. नेत्रगोलक, ८. शारीरिक.

रामांच्या क्रोधाबद्दल कैकेयीस भय : कैकेयी म्हणे रघुनाथा । तुझेनि रायासी पूर्ण व्यथा । तेही तुज सांगेन आतां । कोप सर्वथा न करावा ।।१।। माझें ऐकतांचि वचन । तुज कोप येईल पूर्ण । यालागीं धाके माझें मन । पूर्वकथन सांगावया ।।२।। ऐकोनि कैकेयीचें वचन । रामें तिचे धरिले चरण । ऐसा महापापी कोण । जो मातृवचनविरोधी ।।३।। त्रिसत्य सत्य हें जाण । तुझें वचन मज प्रमाण । वाहतों वसिष्ठाची आण । विकल्प पूर्ण सांडी माये ।।४।। ऐकोनि श्रीरामाचें निर्वाण । कैकेयी उल्हासली आपण । रामें करावया वनप्रयाण । धर्मवचन उब्दोधी[१] ।।५।। कैकेयीची युक्ती कैसी । राम करावा वनवासी । धर्मवचनाचे[२] पाशीं । श्रीरामासी दृढ बांधावें ।।६।। दृढ वराचें वरबंधन । जेणें दशरथासी दुःख संपूर्ण । तें निवारील रघुनंदन । प्रतिज्ञा प्रमाण वनवासा ।।७।। राज्य सांडोनि वना जातां । दुःख नाहीं श्रीरघुनाथा । वनाभिगमन उल्हासता । लंकानाथवधार्थी ।।८।। एकाजनार्दना शरण । जालें श्रीरामागमन । पुढां करावया वनाभिगमन । सावधान अवधारा ।।१०९।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणें अधोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामागमनं नाम पंचमोऽध्यायः ।।५।। ओंव्या ।।१०९।।

## अध्याय सहावा

### कौसल्येचे सान्त्वन

।। श्रीरामचंद्राय नमः ।।

कैकेय्युवाच

राजा न कुपितो राम व्यसनं नास्य किंचन । किंचिन्मनोगतं त्वस्य त्वद्भयान्नानुभाषते ।।१।।
प्रियं त्वामप्रियं वक्तुं वाणी नास्य प्रवर्तते । तदवश्यं त्वया कार्यं यदनेन श्रुतं मम ।।२।।
एष मह्यं वरं दत्वा पुरा मामभिपूज्य च । पश्चात्संतप्यते:राजा यथान्य:प्राकृतस्तथा ।।३।।

श्रीरामांनी शपथपूर्वक आश्वासन दिल्यानंतर कैकेयीकडून वरांचे वृत्तकथन : पूर्व प्रसंगी आपण । रामें वाहिली वसिष्ठाची आण[३] । तेणें कैकेयी सुखसंपन्न । पूर्वकथन[४] तें सांगे ।।१।। रायासी नाहीं ज्वरादि अवस्था । नाहीं भूतसंचारता । आणिक कांही नाहीं व्यथा । तुझी ममता बहु बाधी ।।२।। तें रायाचें मनोगत । सांगतां तुझें पोळेल चित्त । यालागीं पैं नृपनाथ । साशंकित[५] सांगावया ।।३।। तूं रायाचा प्रिय पूर्ण । प्रियापासीं अप्रिय वचन । सर्वथा न बोलवे जाण । यालागीं मौन धरी रावो ।।४।। रायाची पूर्व भाक । ते त्वां करावी आवश्यक । पितृवचनपरिपाळक । तिन्ही लोक वंदिती ।।५।। रुक्मागंद सूर्यवंशी । व्रत भंगतां एकादशी । धर्मांगद शिर दे त्यासी । वैकुंठवासी जगद्वंद्य ।।६।। तूं तंव सत्यवादी रघुनाथ । जगीं तुझा थोर पुरुषार्थ । पित्याची भाक तूं करी सत्य । पितृवचनार्थ प्रतिपाळीं ।।७।। रायाचें मज वरदान । माझें मज नेदितां जाण । तुज देवों केंवी आपण । लज्जायमान तेणें रावो ।।८।। देऊं केले तुजप्रती । तें नेदीं न म्हणे भूपती । काय बोलावें तुजप्रती । सलज्ज चित्तीं नृपनाथ ।।९।। ऐकोनि कैकेयीची वाणी । श्रीराम श्रीसत्यशिरोमणी । लागोनि मातेच्या चरणीं । काय गर्जोनी बोलत ।।१०।।

राम उवाच –
अहं हि वचेनाद्राज्ञः पतेयमपि पावके । भक्षयेयं विषं तीक्ष्णं मज्जेयमपि चार्णवे ।।४।।
नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हि तेन च । तद्ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ।।५।।
प्रतिजाने करिष्येऽहं रामो द्विर्नाभिभाषते ।।६।।

---

शब्दार्थ - १. सांगू लागली, २. बापाचे वचन पाळणारा, ३. शपथ, ४. वरांची पूर्वकथा, ५. संकोच वाटतो, शरम वाटते.

पितृवचनपूर्तीचे कैकेयीस आश्वासन : गुरुवचन पितृवचन । न करीं तो पापी पूर्ण । मनुष्यवेषें तो श्वान । काळें वदन तयाचें ॥११॥ गुरुवाक्य विषम[1] वितंड । न करी म्हणे जयाचें तोंड । तें तोंड नव्हे रौरवकुंड । पापी प्रचंड तो एक ॥१२॥ गुरुवचनअविश्वासी । जिताचि तो नरकवासी । प्रेतें आतळों भीती त्यासी । महापापराशी तो एक ॥१३॥ यालागीं पितृवचन अन्यथा । मी न करीं वा सर्वथा । त्रिसत्य सत्य हें तत्वतां । विकल्प चित्ता धरूं नको ॥१४॥ तुज कैसें कैसें वरदान । रायें दिधलें आपण । त्याचें समूळ कथन । कृपा करोनि मज सांगिजे ॥१५॥ ऐकोनि श्रीरामसत्यवाणी । कैकेयी उल्हासिली मनीं । वरदप्रतापाची कहाणी । हरिखें गर्जोनी सांगत ॥१६॥

पुरा देवासुरे युद्धे पित्रा ते मम राघव । रक्षितेन वरौ दत्तौ सशल्येन महारणे ॥७॥

तत्र मे याचितो राजा भरतस्याभिषेचनम् । गमनं दंडकारण्ये तव चाद्यैव राघव ॥८॥

दोन वरांची गोष्ट : पूर्वी शुक्राचे युद्धार्थ । दशरथ गेला मजसमवेत । शुक्रासी साह्य दैत्य समस्त । देवसाह्यार्थ दशरथ ॥१७॥ देवां दैत्यां युद्ध पूर्ण । थोर जाले रणकंदन । दशरथें दैत्यां दारुण । बाणीं संपूर्ण निवटिले ॥१८॥ वृषपर्वा दैत्यनाथ । रायें रणीं केला विरथ । पायीं पळतां रणांत । बाणीं मूर्च्छित तो पाडिला ॥१९॥ रायें मारिलें वृषपर्व्यासी । म्हणोनि शुक्रें पाठी घातलें त्यासी । निर्वाणयुद्ध दशरथेसीं । अति क्रोधेंसीं मांडलें ॥२०॥ शुक्रें बाणलाघवाआंत । आंख[2] छेदोनि राजा केला विरथ । युद्धी विचंबला[3] दशरथ । म्हणोनि बाहु चक्रांत सूदला[4] म्यां ॥२१॥ माझे बाहूचा निजनेट । रथ चालिला घडघडाट । शुक्राचा रथ करोनियां पीठ[5] । शिरींचा मुकुट पाडिला ॥२२॥ युद्धीं निवटावें शुक्रासी । ब्राह्मण म्हणोनि रक्षिलें त्यासी । यश आलें दशरथासी । जयो रायासी माझेनि ॥२३॥

वरांचा तपशील : ते वेळीं रायें अति संतोषीं । दोन वर दिधले भाकेसीं । एकें राज्यपट भरतासी । एकें वनवासी श्रीराम ॥२४॥ रामा रहिवास वनांतरीं । दंडकारण्यामाझारीं । वल्लांबरें जटाधारी । गौतमीतीरीं[6] रहिवासू ॥२५॥ ज्येष्ठ सांडोनियां दुरी । भरत सर्वथा राज्य करी । तैसी मी नव्हें पापाचारी । ऐक निर्धारीं नेमा माझ्या ॥२६॥ मज नाहीं अत्यंत स्वार्थ । चौदा वर्षें नेमस्त । राज्य करील माझा भरत । पुढें रघुनाथा निजराज्य ॥२७॥ राज्यांतील अणुप्रमाण स्वयें न न्यावें आपण । पितृवचन जरी प्रमाण । तरी वनप्रयाण आजीच ॥२८॥ अजिन[7] वल्कलें जटाधारी । वना निघावें झडकरी । कंदमूळफळाहारीं । गौतमीतीरी रहिवासू ॥२९॥

पितृवचन पाळण्याविषयी श्रीरामांचा उत्साह : ऐकोनि कैकेयीचें उत्तर । श्रीराम जाला हर्षे निर्भर । वना निघावया सत्वर । हृदयीं अपार आल्हाद ॥३०॥ कैकेयी हे एक खोटी । हा विकल्प नाहीं रामाच्या पोटीं । तिची सत्य मानोनि गोष्टी । विश्वासें जगजेठी वना निघे ॥३१॥ राज्य गेलियाचें नाहीं दुःख । वना जायाचें परम सुख । बाहुस्फुरणीं चालिला हरिख । प्रसन्नमुख वनाभिगमनीं ॥३२॥ सर्वेचि पुसे मातेसी । रावो कां न बोले मजसीं । येरी म्हणे अतिशयेसीं । लज्जा त्यासी जालीसे ॥३३॥ पहिलें तुज राज्य देऊं केलें । आतां वना जाय हें केवीं बोले । या लाजा मौन पडलें । मुख आपुलें दाखवीना ॥३४॥ मानावें पित्याचे वचनार्था । तूं तंव माझी निजमाता । तुझे वचन न मानिता । वेदशास्त्रार्थी मी निंद्य ॥३५॥ पित्यापरीस माता श्रेष्ठ । हे संन्यासपद्धति निर्दुष्ट[8] । तुझें वचन मज वरिष्ठ । सुख उद्भट वनवासीं ॥३६॥ संन्यास घेतलियावरी । पिता पुत्रातें नमस्कारी । संन्यासी माता वंदी शिरीं । आज्ञाधारी

---

शब्दार्थ – १. विरुद्ध, प्रतिकूल, २. रथाचा आंस, ३. कष्ट पावला, ४. घातला, ५. ठार मारावे, ६. गोदावरीच्या तीरावर, ७. मृगचर्म, ८. पवित्र, मंगल.

तियेचा ॥३७॥ जें तुज मातेसी होय सुख । आणि पित्याचीं प्रतिपाळें[1] भाक । ते मज करणें आवश्यक । श्रीराम निःशंक बोलिला ॥३८॥ पितयाची पढियंती[2] तत्वतां[3] । तें तूं माझी सखी माता । विकल्प न धरीं वो चित्ता । तुझिया वचनार्था अनुकूल ॥३९॥

कैकेयी आनंदातिशयाने श्रीरामांस दृढालिंगन देते. त्यामुळे तिचे हृदयपरिवर्तन : ऐसें ऐकतां श्रीरामवचन । कैकेयी जाली सुखसंपन्न । आनंदाश्रु लोटती नयन । दिधलें आलिंगन श्रीरामा ॥४०॥ श्रीरामासी आलिंगतां । विकल्प निघाला आंतौता[4] । कैकेयीस उपजे सद्भावता[5] । त्याचि वचनार्था बोलत ॥४१॥ ते म्हणे तू निर्मळ रघुनाथा । येर तंव न बोलवे आतां । तुज वनवासीं असतां । पूर्ण विजयता मद्वाक्यें ॥४२॥ आतां राम न बैसे राज्यपटीं । म्यां व्यर्थ कां करावी गोष्टी । हा पित्याच्या भाकेसाठीं । वना उठाउठीं जाईल ॥४३॥ राम सत्यवादी निजनिर्धारीं । आजि मज कळली थोरी । हा पितृवाक्यावरी[6] । जाईल वनांतरीं दंडकारण्या ॥४४॥ श्रीराम वनाभिगमन । ऐकतां राय पडे विसंज्ञ[7] । त्याचे श्रीरामें वंदोनि चरण । निघे आपण वनवासी ॥४५॥ कैकेयीच्या चरणीं ठेविला माथा । म्हणे तुवां पूर्ण कृपा केली आता । शांतवावी कौसल्या माता । चिंता दशरथा करों नेदीं ॥४६॥ दोघां करोनि प्रदक्षिण । राम करी वनाभिगमन । कैकेयी गहिंवरली पूर्ण । दीर्घ स्वरें रुदन राव करी ॥४७॥ ऐकतां रायाची ग्लानी । राम निघे धैर्य धरोनी । वना जावया उल्हास मनीं । सापत्नवचनीं विश्वासु ॥४८॥

लक्ष्मण कोपाविष्ट होतो : क्रोध लक्ष्मणाचे पोटीं । भोंवयांसी घालोनि गाठी । निघाला श्रीरामाच्या पाठीं । क्रोधदृष्टीं संतप्त ॥४९॥

गमने च मतिं चक्रे वनवासाय लक्ष्मणः । अनुचिंत्य विना रामं न हि जीवितुमुत्सहे ॥९॥

लक्ष्मणाचें मनोगत । वना गेलिया रघुनाथ । मीही जाईन त्यासमवेत । हा निश्चितार्थ सौमित्रीं ॥५०॥ रामावेगळें जीवें प्राणें । अर्ध क्षण नाहीं राहणें । ऐसा निश्चयो लक्ष्मणें । स्वांतःकरणें दृढ केला ॥५१॥ उल्लंघोनि राजभवना । अभिषेकपात्रां प्रदक्षिणा । करोनि राम निघाला वना । हाहाकार जना होंसरला[8] ॥५२॥

तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्कामति कृतांजलौ । आर्तशब्दा महाञ्जज्ञे स्त्रीणामंतःपुरे तदा ॥१०॥

कैकेयी मंदिरात इतर राण्यांचा विलाप : कैकेयीचे निजमंदिरीं । अति आक्रंदें रडती नारी । राम दवडिला वनांतरी । दृढ दुराचारी कैकेयी ॥५३॥ एकी कान केश तोडिती । एकी अति दुःखें आरडती । स्त्रीजित जाला भूपती । बाळ वनाप्रति धाडिला केंवी ॥५४॥

कौसल्या मंदिरात श्रीरामांचे आगमन, पित्याच्या वरांचे कथन : तयांचे ऐकोनि रुदन । वेगें निघे रघुनंदन । ठाकूनियां आला मातृभवन[9] । वनाभिगमन सांगावया ॥५५॥ न घेतां मातेचें आज्ञापन । कार्य साधेना निर्विघ्न । ऐसे जाणोनि रघुनंदन । आला आपण मातृभवना ॥५६॥ जन बोलती समस्त श्रेष्ठ । दशरथा नियामक वसिष्ठ । तेणें श्रीरामासी राज्यपट । करावा वरिष्ठ गुरुप्रतापें ॥५७॥ वसिष्ठाचिया आज्ञेपुढें । कैकेयी कायसें बापुडें । राजा बोलों न शके तोंडें । त्यासीही निवाडें[10] सांगा कोणी ॥५८॥ वना गेलिया रघुपती । त्याची थोर वाढेल किर्ती । वसिष्ठें जाणोनि निश्चितीं । जातां वनाप्रति ना न म्हणे ॥५९॥ आपण शीघ्र वनाभिगमनी । हें मातेसी सांगावयालागूनी । राम प्रवेशला मातृभवनीं । उल्हास मनीं गमनाचा ॥६०॥ रामें नमस्कारिली निजजननी । येरी आलिंगी उल्हासोनी । गुरूपुष्याच्या अभिषेचनीं ।

शब्दार्थ – १. राखली जाईल, २. आवडती, ३. खरोखर, ४. मनामधील, ५. निर्मळ प्रेम, ६. पित्याच्या वचनावरून, ७. बेशुद्ध; ८. प्राप्त झाला, ९. कौसल्येच्या मंदिरात, १०. निश्चयात्मक.

राजा त्रिभुवनीं तूं होसी ॥६१॥ गुरुपुष्याचा सुमुहूर्त । सभाग्यासी होय प्राप्त । तेणें मुहुर्तें अभिषिंची दशरथ । राजा रघुनाथ तिहीं लोकीं ॥६२॥ त्या मुहूर्तांचें ऐसें काज । जगीं होईल रामराज्य । सुरनर नाचती आनंदभोज[1]। निश्चय मज कळलासें ॥६३॥ वसिष्ठअभिषेकाचें जळ । त्याचें ऐसें आहे बळ । तिहीं लोकींचे राज्य अढळ । होईल सकळ श्रीरामा ॥६४॥ ऐसें बोलतां कौसल्येसी । श्रीराम सांगे तियेपासीं । जाला अभिप्राव[2] तूं नेणसी । सावकाशीं अवधारीं ॥६५॥ पूर्वी रायें निजभाकेंसीं । दोन वर दिधले कैकेयीसी । एकें राज्यपट भरतासी। एकें वनवासी श्रीराम ॥६६॥ भाकें[3] गोविलें दशरथा । कैकेयीनें साधिलें निजस्वार्था । राज्याभिषेकीं नेमिलें भरता । मज वनांत धाडिलें ॥६७॥ मर्यादा नेमूनि चौदा वर्षीं । दंडकारण्यीं विजनदेशीं[4]। गोदावरी रहिवासीं। फळमूळांसी सेवूनी ॥६८॥ राज्यांतील नेवों नये अणुमात्र। त्यजोनि वस्त्रें अळंकार । कृष्णाजिन वल्कलांबर । जटाधारी वनवासी ॥६९॥ रायें नेमिलें नेमस्त । वनप्रयाणा सुमुहूर्त । आजीच निघावें त्वरित । पुसावया येथ मी आलों ॥७०॥

कौसल्येचा आक्रोश : ऐकोनि श्रीरामाची वाणी । जीवा मना अति आटणी[5] । मूर्च्छापन्न पडली धरणीं । खुंटली वाणी अति दुःखें ॥७१॥ गरगरिती नेत्रवाट[6] । बाष्पें रोधिला पै कंठ । श्वासें फुटों पाहे पोट । प्राणसंकट मांडलें ॥७२॥ पुत्रवियोगाचा घावो । दृढ जिव्हारीं खोंचला पहाहो । पुत्रशोकें पूर्ण विरहो । पडला देहो मूर्च्छित ॥७३॥ माता मूर्च्छित भूतळीं । रामें उचलूनि ते वेळीं । झाडोनियां धूसरधूळीं । हृदयकमळीं आलिंगली॥७४॥ तीस रामें सावधान करितां । म्हणे मज मरूं दे रघुनाथा । पुत्रवियोगें जिणें जितां । परम व्यथा मातेसी ॥७५॥ येथोनि श्रीरामाचें मुख । मागुती कैं देखेन देख । तेणें आक्रंदें दिधली हाक । हृदयीं दुःख दाटलें ॥७६॥ कांटा रुतला फणिकपाळीं[7]। पुच्छ तुटल्या सापसुरळी[8]। जैसी जळावेगळी मासोळी । तैसी तळमळी कौसल्या ॥७७॥ कपटी म्हणों जातां रावो । माझें पातिव्रत्य होईल वावो[9]। पतिअवज्ञा थोर अन्यावो। विकिला देहो पतिवाक्या ॥७८॥ कैकेयी भर्तारप्रियकर । तिसीं मज करितां मत्सर । माझा अपराध मी देखें थोर । अति दुस्तर मज रामा ॥७९॥ कैकेयीचा आजिवरी । मज द्वेष नाहीं तिळभरी । भर्तारकृपा जियेवरी । ते निर्धारीं मज पूज्य ॥८०॥ घारी झडपोनियां कैकेयीसी । गर्भप्रसाद नेता आकाशीं । अर्धपिंड दिधला तिसी । निजपतीसी संतोषा ॥८१॥ तैंपासोनि दशरथ । मजवरी कृपा करी अत्यंत । अन्यायी नव्हे नृपनाथ । अभागी येथ मी रामा ॥८२॥ कैकेयीचा कोण अन्यावो । तीस निजपुत्राचा मोहो । वना जातां रामरावो । अभागी पहा हो मी एकी ॥८३॥

पितृवचनाचा भंग न करिता मातेची आज्ञा पाळण्याविषयी कौसल्येची युक्ती : रायाचें वचन वंदोनि माथा । वना रिघतोसी रघुनाथा । माझें वचन पाळिसी आतां । अति गुह्यार्था सांगेन ॥८४॥ रायाचें वचन सिद्धी जाय । माझें वचन पाळिलें होय । ऐसें कांही एक वर्म आहे । तें तुज मी पाहें सांगेन ॥८५॥ पित्याच्या प्रतिपाळावें वाक्यार्था । तेणेंचि सुखावे निजमाता । तें मज करणं वो सर्वथा । चरणीं माथा ठेविला रामें ॥८६॥ राज्य देवोनि भरतासी । तुवां रहावें मजपासीं । माझियें श्रृंगारवाटिकेसीं[10] । चौदा वर्षें वनवास ॥८७॥ दवडोनि सेवकां सर्वांसी। राज्य सांडोनि वैभवासीं । माझ्या शृंगारवाटिकेसीं । चौदा वर्षें वनवास ॥८८॥ न भेटावें प्रधानांसी । न भेटावें निजप्रजांसी । माझिये शृंगारवाटिकेसीं । चौदा वर्षें वनवास ॥८९॥ न

---

शब्दार्थ - १. अत्यानंदाने, २. गोष्ट, घटना, ३. अडविले, गुंतविले, ४. निर्जन प्रदेशात, ५. क्लेश, ६. डोळ्यातील बुबुळे, ७. सर्पाच्या डोक्यांत, ८. चोपई, ९. व्यर्थ, १०. शृंगारवनात.

भेटावें गृहस्त्रियांसी । न भेटावें निजप्रियांसी । बसोनि शृंगारवाटिकेसीं । चौदा वर्षं वनवास ॥९०॥ न भेटावें दशरथासी । न भेटावें वसिष्ठासी । माझिया शृंगारवाटिकेसी । चौदा वर्षें वनवास ॥९१॥ रायाची आज्ञा अति सधर[१] । त्यजोनि वस्त्रें वल्कलांबर । अलंकार सांडोनि जटाभार । फळाहार करूं दोघें ॥९२॥ तुजशीं असोनियां एक । तृण सेवितां परम सुख । तुजवेगळें पीयूख[२] । केवळ विख[३] मज होय ॥९३॥

कौसल्येची युक्ती राजाज्ञेला बाधक : ऐकोनियां मातेच्या वचनासी । श्रीराम लागला पायांसी । आश्वासूनि कौसल्येसी । निजधर्मासी सांगत ॥९४॥ रायाची आज्ञा आहे ऐशी । जावें दंडकारण्यासी । राहतां शृंगारवाटिकेसीं । पितृवचनासी विरोध ॥९५॥ तूं बोलसी मोहसंभ्रम[४] । मज पितृवाक्य पूज्य परम । सांडोनि मोह ममता भ्रम । आज्ञा परम मज देई । ॥९६॥ तुझी आज्ञा पैं न होतां । मज यश नये सर्वथा । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । प्रसन्नता मज प्रेरीं[५] ॥९७॥ पित्याचें वचन नुल्लंघिता । याहूनि अधिक जाण माता । सावध परिसें रघुनाथा । वेदशास्त्रार्था अनुमत ॥९८॥

दशविप्रानुपाध्यायो गौरवेणातिरिच्यते । उपाध्यायाद्दश पिता गौरवेणातिरिच्यते ॥११॥
पितन् दश च मातैका सर्वा वा पृथ्वीमपि । गौरवेणाधिका लोके न मातृसदृशो गुरु : ॥१२॥

पिताजींच्या आज्ञेपेक्षा मातेच्या आज्ञेचे महिमान श्रेष्ट असा युक्तीवाद : कौसल्या बोले आपण । ऐकें श्रीरामा सावधान । सांगेन मातेचें महिमान । अति गहन वेदोक्त ॥९९॥ स्वधर्मकर्मीं अति निपुण । दहा ब्राह्मण अति सज्ञान । एक आचार्य त्यांसमान । ऐसें महिमान आचार्याचें ॥१००॥ दश आचार्य श्रेष्ठ कर्मप्रवृत्तीं । त्यांहूनि ज्याची अधिक शक्ती । पुत्रविक्रयीं का दूरीकायार्थी । नियामकत्वें निश्चिंत्तीं पिता अधिक ॥१॥ दशाचार्याविशेषीं । गुरुत्वें गौरव पित्यासी । पित्याहूनि दशगुणेंसीं । गुरुत्वें मातेसीं भजावें ॥२॥ गर्भधारणपोषणेंसीं । मातेसी गुरुत्व विशेषीं । पृथ्वीपरीस मातेसीं । पूज्यत्वेसीं गौरव ॥३॥ पिता जालिया पतित । पुत्रें त्यागावा निश्चित । माता जालिया पतित । पूज्यत्व शास्त्रार्थ प्रतिपादी ॥४॥ पुत्र जालिया संन्यासी । अवश्य त्यागावें पितयासी । भिक्षा मागोनि मातेसी । पोसावें संन्यासविधीं शास्त्रार्थ ॥५॥ यापरी गा रघुनाथा । पित्यापरीस पूज्य माता । माझिया भजावें वचनार्था । वना सर्वथा न जावें ॥६॥ मातृवाक्य मानोनि गौण । करिसी पितृवाक्याचें परिपाळण । हें तुज गा परम दूषण । माझें वचन उल्लांघितां ॥७॥

श्रीरामांचे उत्तर, पूर्वीचे उदाहरण : श्रीराम म्हणे कौसल्येसी । तूं श्रेष्ठत्वें पूज्य होसी । येचिविषयीं पूर्वधर्मासी । ऐक तुजपासीं सांगेन ॥८॥ पूर्वीं पितृवाक्यें तत्वतां । परशुरामें छेदिलीमाता । नुल्लंघीच पितृवचनार्था । पूज्य पिता म्हणोनी ॥९॥ पुत्रें वधिलें निजमातेसी । रेणुका न[६] क्षोभेचि रामासीं । प्रतिपाळिलें पतिवचनासी । तूंही जाणसी हे कथा ॥११०॥ मज पितृवाक्य पूज्य पूर्ण । तुजही पतिवचन प्रमाण । त्याचें करिता उल्लंघन । अध:पतन[७] दोघांसी ॥११॥

कौसल्येचा आर्त विलाप : ऐकोनि पुत्राच्या वचना । म्हणे तुझा वियोग रघुनंदना । मरणाहुनि चौगुणा । तरी सवें वना मज नेईं ॥१२॥ या तरी पाळीं माझ्या वचना । मज सवें न्यावें वना । म्हणोनि लागली श्रीरामचरणां । अति करुणा विलपत[८] ॥१३॥ काय करूं रे रघुनाथा । मज तव मरण नये आता । न साहवे वियोगव्यथा । वना सर्वथा मज न्यावें ॥१४॥ पुत्रासवें वनवासासी । सर्वथा जाता नये मातेसी । ऐकतां क्षोभेल वसिष्ठ ऋषीं । केवीं वनवासासी

---

शब्दार्थ - १. बळकट, मोठी, २. अमृत, ३. विष, ४. मायेने भुलून, ५. पाठवावे, ६. क्षोभली नाही, ७. वनवास, ८. शोक करू लागली.

म्यां न्यावें ॥१५॥ ऐसियापरी निजधर्मता । रामें संबोधिली माता । तिच्या चरणीं ठेविला माथा । क्षमा सर्वथा मज कीजे ॥१६॥

लक्ष्मणाचा संताप व उपाययोजना : ऐकोनि कौसल्याकरुणावचन । लक्ष्मण क्षोभला आपण । म्हणे श्रीरामा ऐक माझें वचन । वनप्रयाण करूं नको ॥१७॥ परम सुख दशरथासी। कौसल्या पावे निजसुखासी । जाणें न लागे तुज वनासी । तें मजपासीं वर्म आहे ॥१८॥ आज्ञा देशील रघुनाथा । तरी मी साधीन कार्यार्था । ऐक तेही व्यवस्था । तुज मी आंता सांगेन ॥१९॥ कैकेयीच्या करीन घाता । तैं परम सुख दशरथा । सुखावेल कौसल्या माता । राज्यीं रघुनाथा अभिषेक ॥१२०॥ कैकेयीच्या निजकैवारा । आलिया निवटीन सुरवरां । रणीं निर्दाळीन असुरां । भरीन सागरा अशुद्धें ॥२१॥ लोहें[1] घोटीन पैं मांसं । पृथ्वी करीन निर्मनुष्य। यमलोक पाडीन ओस । लावीन त्रास कळिकाळा ॥२२॥ पाठीसी असिलिया रघुनाथ । कृतांताचे पाडीन दांत । मजला भय नाहीं निश्चित । दुष्ट समस्त निर्दाळीन ॥२३॥ तूं म्हणसी हें अप्रमाण । माझे वचन परम प्रमाण । दुष्टां करावया निर्दळण । अवतार पूर्ण श्रीराम ॥२४॥ दुष्टांमाजि दुष्ट संपूर्ण । मुख्यत्वें अति कैकेयी जाण । सुहृदश्रिये विध्वंसन । प्रियाच प्राणघातकी ॥२५॥ सुमुहूर्त दुष्टदळणीं । पहिली कैकेयीची बोहणी[2] । मातापुत्रविघडणी । महापापिणी पतितापी ॥२६॥ दुःखें रडे तो दशरथ । त्याचा न मानी हे वचनार्थ । पायां लागतां नृपनाथ । पितवचनार्थ मानीना ॥२७॥ पित्यापुत्रां करावया तुटी[3] । दृढ दुष्टत्व कैकेयीच्या पोटीं । रामां घालवी दिग्पटीं[4] । परम खोटी हे एकी ॥२८॥ इचा करितां पैं घात । सुख होईल जगाआंत । कौसल्येसी दशरथ प्राप्त । राज्यीं रघुनाथा अभिषेक ॥२९॥ भर्तृवचन नाणी दृष्टीं । श्रीराम द्वेषी महाहट्टी । इसी मारिल्या पुण्यकोटी । स्वानंदपुष्टी तिहीं लोकीं ॥१३०॥ येच विषयीं रघुनाथा । मज आज्ञा देइजे आतां । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । क्षोभकत्व अनिवार ॥३१॥

लक्ष्मणाला श्रीरामांचा उपदेश, पितृपत्नी मातृवत् आहे : देखोनि सौमित्राचें चिन्ह । श्रीराम त्यासी दे समाधान । तुझें बळ आंगवण[5] संपूर्ण । मी आपण स्वयें जाणें ॥३२॥ वाटीव लांठीव[7] वीरवृत्ती । चारी पुरुषार्थ तझे हातीं । येवढें[6] असोनि अपकीर्ती । आपणाप्रति येवां नेदीं ॥३३॥ आतुर्बळी[8] पुरुषार्थेंसीं । तेणें मारावें मातेसी । दुःख द्यावें पितयासी । हेचि आम्हांसी अपकीर्ति ॥३४॥ पित्यासी पढियंती सर्वथा । ते तंव आपली सखी माता। तिच्या करितां निजघाता। अधर्मता शास्त्रार्थी।॥३५॥ पित्याने हात घातला दासीसी । ते तंव माता होय पुत्रासी । विरुद्ध करूं नये तियेसीं । मा कैकेयीसी केवि मारूं ॥३६॥ पितृवचन-उल्लंघन । त्यावरी मातेचें हनन। तें तंव होय जगीं जघन्य[9] । निंदा पूर्ण तिहीं लोकीं ॥३७॥ येवोनि सूर्यवंशाप्रती । येवढी जोडावी अपकीर्ती । सौमित्रा घडे ऐसी युक्ती । पूर्वज क्षोभती स्वर्गस्थ ॥३८॥ सा मास सुरी पारिजिली[10] । घरची म्हातारी खोंचिली । ते अपकीर्ति आम्हींच केली । जरी वधिली कैकेयी ॥३९॥

पराक्रमच गाजवायचा तर राक्षसांसमोर गाजवावा : आंगीं बळ आहे पूर्ण । स्त्रिये मारणें पुरुषार्थ कोण । पित्यासी दुःख देणें दारुण । अधःपतन तैं आम्हांसी ॥१४०॥ आंगीं बळाची दृढ

---

शब्दार्थ - १. रक्ताने, २. आरंभ, ३. ताटातूट, ४. देशांतराला, ५. पराक्रम, ६. घडलेली, अनुभवास आलेली, ७. दांडगी, ८. महाबलाढ्य, ९. नीच, १०. धार लागली.

प्रौढी । वना जातां कोण सांकडी । मारूं राक्षसांच्या कोडी । सोडवूं बांधवडी देवांची ॥४१॥ बांधोनि स्वधर्माचा सेत । दुष्ट निर्दाळू लंकानाथ । कीर्ति न समाय त्रैलोक्यांत । हा पुरुषार्थ साधावा ॥४२॥

लक्ष्मणाचे वंदन, वनात बरोबर नेण्याची प्रार्थना : ऐकोनि श्रीरामाचें वचन । सौमित्र करी साष्टांग नमन । रामें दिधलें आलिंगन । तेणें समाधान दृढ जालें ॥४३॥ पुढती घातलें लोटांगण । पुढती बंदी श्रीरामचरण । तुझे सेवे मी वना येईन । दुष्टकंदन करावया ॥४४॥ पुढती नाचे पुढती गायें । पुढती वंदी श्रीरामपायें । तूंचि बाप तूंचि माये । गर्जताहे स्वानंदें ॥४५॥ श्रीरामा देई निजभाकेसी[1] । मज न्यावे वनासीं । सेवा करावया वनवासीं । निजमानसीं उल्हास ॥४६॥

कौसल्येचे समाधान, वनगमनास अनुज्ञा : ऐकून श्रीरामाच्या युक्ती । कौसल्या सुखावली चित्तीं । वना नवजावा रघुपती । आग्रहस्थितीं सांडिली ॥४७॥ श्रीरामाचें निजवचन । तेणें सुखसमाधान । सुखी जाला लक्ष्मण। सुखसंपन्न कौसल्या ॥४८॥ माता आणि सौमित्रबंधु । दोघां जाहला सुखसंवादु । एकाजनार्दनीं विनोदु । परमानंदु श्रीरामा ॥४९॥ एकाजनार्दनी शरण । शेकामाजी सुख संपूर्ण । कौसल्या सुखावोनि आपण । करवी वनप्रयाण श्रीरामा ॥१५०॥ करोनियां पुण्याहवाचन । श्रीरामासी वनप्रयाण। कौसल्या करवी आपण । स्वस्तिवाचन अवधारा ॥१५१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां कौसल्यासांत्वनं नाम षष्ठोध्यायः ॥६॥ ओंव्या ॥१५१॥

## अध्याय सातवा

### सीता-लक्ष्मण वनगमननिर्धार

श्रीरामांचा दृढ निश्चय ओळखून कौसल्या त्यांचे स्वस्तयन करते : श्रीरामचंद्राय नमः ॥ झाली कौसल्या सुप्रसन्न । श्रीरामासी वनाभिगमन । करावया करी पुण्याहवाचन । स्वस्त्ययन[2] अवधारा ॥१॥

निश्चितं त तथा रामं विज्ञाय गमनोत्सुकम् । प्रास्थानिकं स्वस्त्ययनं कर्तृमिवोपचक्रमे ॥१॥
सा विनीय तमायासमुपस्पृश्य जलं शुचि । चकार माता रामस्यं मंगलानि मनस्विनी ॥२॥
गधैश्चापि समालभ्य राममायतलोचना । ओषधीं च सुसिद्धार्थां विशल्य करणीं शुभाम् ॥३॥
चकार रक्षां कौसल्या मंत्रैरभिजजाप च । देवानभ्यर्च्य विधिवत्प्रणम्य च शुभव्रता ॥४॥

वनीं व्हावया वनवासी । अति उल्हास श्रीरामासी । कौसल्या जाणोनि निश्चयेसीं । धाडी वनासी स्वस्त्ययनें ॥२॥ करोनि करचरणक्षाळण । कौसल्या करी शुद्धाचमन । करविलें देवतार्चन । रघुनंदननिजविजया ॥३॥ सुमनचंदनीं अति ओजा[3] । पूजा केली अधोक्षजा । लोटांगणीं गरुडध्वजा । वनीं राम माझा तूं संरक्षीं ॥४॥ नाना जळें सेवितां पाहें । रोग उपजोंचि न लाहें । त्या ओषधी आणोनि लवलाहें । बांधिल्या बाहे[4] श्रीरामा ॥५॥ ज्या ओषधी देखिल्याप्रती । राक्षस जीव घेवोनि पळती । त्याही आणोनि निश्चितीं । बांधिल्या हातीं श्रीरामा ॥६॥ वनवासीं नित्य निर्विघ्न । विजयी व्हावया रघुनंदन । सर्वी सर्वांचें प्रार्थन । करी आपण कौसल्या ॥७॥

ब्रह्मदेवादिकांची रामरक्षणाविषयी प्रार्थना : जगद्गुरु जो कां ब्रह्मा । तेणें रक्षावें श्रीरामा ।

शब्दार्थ - १. आपले वचन, २. कल्याण होवो म्हणून आशीर्वाद, ३. भक्तिपूर्वक, ४. हाताच्या बाहीला.

सदाशिवासहित उमां[1] । माझ्या श्रीरामा संरक्षू ।।८।। विष्णु जो का त्रैलोक्यनाथ । तेणें रक्षावा माझा रघुनाथ । विचरता वनाआंत । साह्य संतत अहर्निशी ।।९।। साह्य होऊत ऋषिगण । साह्य होऊत सिद्ध चारण । साह्य होऊत मरुद्गण । रघुनंदनवनवासीं ।।१०।। पूषा[2] भगार्यमा धाता[3] । मित्र चंद्र यम आदित्या । वरुण सुविधी विधाता । वनीं रघुनाथा रक्षावें ।।११।।

एकादश रुद्रादि देवतास प्रार्थना : अकरा रुद्र चौदा इंद्र । पदोपदी रक्षो उपेंद्र । साह्य होऊत सप्त सागर । क्षीरसमुद्रशेषशायी ।।१२।। चारी वेद चौदा विद्या । श्रीराम साह्य होऊत सदा । मंत्र मूर्ति मंत्रानुवादा। राम सर्वदा रक्षावा ।।१३।। वेदांमाजी अथर्वण । त्याचे मंत्र अति दारुण । श्रीरामा साह्य होऊत संपूर्ण । वनीं निर्विघ्न करावया ।।१४।। सप्त ऋषीं आणि ब्रह्मऋषी । रामा रक्षोत देवऋषी । नारदा लागतें पायांसी । माझ्या रामासी तूं रक्षीं ।।१५।। शनि भौम महाक्रूर । राहु केतु गुरु शुक्र । श्रीरामासी न व्हावे वक्र । अहोरात्र रक्षावें ।।१६।। नक्षत्रें आणि नक्षत्रपती । धुव्रें रक्षावा श्रीरघुपती । सप्तऋषींसीं अरुंधती । श्रीराममूर्ती तुम्ही रक्षा ।।१७।। विजांसि येतें काकुळती । तुम्हीं न पडावें श्रीरामाप्रती । नानाविधा दिव्यदीप्ती । तुम्हीं रघुपती रक्षावा ।।१८।। बृह जंबुक सिंह व्याघ्र। आश्वलें तरस गौर तगर। सर्प शार्दूळ आणि वानर । तिहीं रामचंद्र रक्षावा ।।१९।। मातलें म्हैसे उन्मत्त गज । मृग वराह आणि दिग्गज । वनदेवता नाचती भोज । तिहीं रघुराज रक्षावा ।।२०।। महापक्षी अति दुर्धर । अग्निमुख नखें क्रूर । श्येन गीधा उलूक घार । तिहीं रामचंद्र रक्षावा ।।२१।। जळींचें क्रूर जळचर । मत्स्य मगर महामकर । माझा रक्षावा रामचंद्र । निरंतर वनवासीं ।।२२।। यक्ष राक्षस पिशाचक । जे कां शिवाचे सेवक । तिहीं माझा रघुकुळटिळक । आवश्यक रक्षावा ।।२३।। मार्गी चालतां रघुकुळटिळक । कंटक होवोनि निष्कंटक । दंश[4] मशक गांधिलें वृश्चिक । तें विख निर्विख हो रामा ।।२४।। गमन शयन अशना[5] । पृथ्वी साह्य होऊन रघुनंदना । त्यांना प्राशना मार्जना[6] । श्रीरामा साह्य जाणा आपू[7] ।।२५।। तमनिरासीं[8] प्रकाशघन । जठराग्निपदीपन। वनीं शीत निवारण । अग्नि संपूर्ण साह्य श्रीरामा ।।२६।। करितां वनवासा प्रयाण । श्रीरामा साह्य पंचप्राण । करिता संग्राम दारुण । बळें संपूर्ण साह्य वायु ।।२७।। श्रीरामाच्या वनवासा। साह्य संपूर्ण आकाशा । हृदयीं चिंतेचा पैं वळसा । अल्पही ऐसा रिघों नेदीं ।।२८।। दिशा आणि विदिशा । साह्य होऊत श्रीराम परेशा । हृदयीं दावोनि चिद्विलासा । चिंतेचा घसा[9] निवटावा ।।२९।। ऋतु मास संवत्सर । लवनिमेषादि तिथिवार । होरा[10] मुहूर्त अहोरात्र । श्रीरामचंद्र रक्षावा ।।३०।। यांहीवेगळे अरण्यवासीं । जे जे असती सामर्थ्येंसी । ते ते साह्य होऊत रामासी । तुमची दासी मी झालें ।।३१।। इंद्र निघतां वृत्रवधासी । गुरूने मंगळें केलीं त्यासी । तीं तीं मंगळें तुजपासीं । अहर्निशीं तिष्ठोत ।।३२।। गरुड जातां अमृतासी । विनतेनें मंगळें केलीं त्यासी । तीं मंगळें तुजपाशीं । अहर्निशीं तिष्ठोत ।।३३।। हरें मर्दावया त्रिपुरासी । उमेनें मंगळें केलीं त्यासी । तीं तीं मंगळें तुजपासी । अहर्निशी तिष्ठोत ।।३४।। हरीनें मर्दितां मुरासी[11]।रमेनें मंगळें केलीं त्यासी । तीं तीं मंगळें तुजपासीं । अहर्निशीं तिष्ठोत ।।३५।। जळचर भूचर खेचर । उग्र रुद्र महाक्रूर । तेणेंसीं साह्य करी श्रीशंकर । दासी किंकर मी त्यांची ।।३६।। वनीं रक्षो तुज वामन । जनीं रक्षो जनार्दन । निरंजनीं मधुसूदन । तुज संपूर्ण संरक्षोत ।।३७।।

---

शब्दार्थ - १. पार्वती, २. पूषा, अर्यमा, भग, धाता ह्या देवता, ३. स्वच्छंदे, ४. डास, ५. भोजनास, ६. मार्जनविधीला, ७. उदके, ८. अंधकार दूर करण्यास, ९. फेरा, भोवंरा, १०. परमात्मस्फूर्ती, ११. आकाशात विहरणारे.

जळीं रक्षो तुज नारायण । स्थळीं रक्षो संकर्षण । रणीं रक्षो सिंहवदन[1] । विदारण अभक्तांसी[2] ॥३८॥ शयनीं रक्षो शेषशायी । शिव रक्षो श्मशानाचे ठायीं । सुषुप्तीमाझारी[3] विदेही । चित्सुख पाहीं तुज रक्षो ॥३९॥ वनीं वसतां रघुनाथ । वीर्य धैर्य नव्हे च्युत । तो तुज राखो अच्युत । वनाआंत विचरतां ॥४०॥ तुज रक्षो आगमनिगम । तुज रक्षो स्थावर जंगम । तुझें संकट दुर्गम । पुरुषोत्तम निवारो ॥४१॥ जनवनां जो जीवन । निरंजना जो निजजीवन । ते तुज रक्षो जनार्दन । लोटांगण त्यासी माझें ॥४२॥

मातेचे करुणाकोमल हृदय : म्यां प्राथिलें देव देवतां । म्यां प्रार्थिलें भूतां समस्तां । म्यां प्राथिलें आदिअच्युता[4] । वनी रघुनाथा रक्षावया ॥४३॥ राम जगाचा निजजिव्हाळा । त्याहीवरी मातेचा कळवळा । अश्रु पूर्ण भरले डोळां । वेळोवेळां आलिंगी ॥४४॥ धणी न पुरे आलिंगितां । धणी[5] न पुरे मुख पाहतां । धणी न पुरे गुज बोलतां । निजमाता कृपाळु ॥४५॥ धणी न पुरे मुख मर्दितां । धणी न पुरे मुख चुंबितां । धणी न पुरें हृदयीं धरितां । ऐसी निजमाता कृपाळु ॥४६॥ धणी न पुरे वदनीं गातां । धणी न पुरे नयनीं पाहता । धणी न पुरे हृदयीं ध्यातां । निजमाता कृपाळु ॥४७॥

श्रीरामांचा प्रणिपात : श्रीरामें येवोनि आपण । त्रिवार करोनि प्रदक्षिण । वंदोनि मातेचे चरण । वनप्रयाण करियेलें ॥४८॥ देखोनि जननीचें वदन । पुढती नमन पुढती गमन । पुढती घाली लोटांगण । प्रेम पूर्ण मातेचें ॥४९॥

कौसल्येचा कळवळा : देखोनि मातेचा कळवळा । श्रीराम कृपेचा कोंवळा । आनंदाश्रु आले डोळां । बाष्पें गळा रोधिला[6] ॥५०॥ तें देखोनि उठाउठीं । कौसल्यें राम धरिला पोटीं । ललाट मर्दोनि ललाटीं । घातली मिठी दृढ चरणीं ॥५१॥ वनाहूनि रघुनाथा । अयोध्येसी तूं येसील विजपता । कैं मी डोळां देखेन मागुतां । श्रीमुखता श्रीरामा ॥५२॥ मागुतेनि श्रीमुख[7] देखेन । तैं होय डोळयां पारण । म्हणोनि आलिंगी जीवें प्राण । वियोगमन न सहावे ॥५३॥ माउलीचें प्रेम पूर्ण । तेणें अश्रु लोटले संपूर्ण । जालें श्रीरामचरणक्षालण । प्रक्षाळण निजदुःखा ॥५४॥

आकाशवाणीची गर्जना : तंव गर्जली आकाशवाणी । श्रीरामा निजविजयो वनीं । दुःख नको करूं जननी । राम त्रिभुवनीं महाराज ॥५५॥ श्रीराम वंद्य ब्रह्मादि देवां । श्रीराम वंद्य दैत्यदानवां । श्रीराम वंद्य सर्व मानवां । श्रीराम स्वयमेव परब्रह्म ॥५६॥ श्रीराम स्वयें परात्पर । श्रीराम स्वयें स्वतंत्र । श्रीराम स्वयें चिन्मात्र[8] । श्रीरामचंद्र परब्रह्म ॥५७॥ श्रीराम गुणी गुणातीत । श्रीराम जीवशिवातीत । श्रीराम स्वयें सदोदित । श्रीराम निश्चित परब्रह्म ॥५८॥ श्रीरामा नाहीं सुखदुःख । जे मानिती ते केवळ मूर्ख । ऐकतां कौसल्ये जालें सुख । हृदयीं हरिख कोंदाटला ॥५९॥

त्यामुळे कौसल्येच्या जीवाला समाधान : ऐसी आकाशवाणी ऐकतां । परम सुख मायपुतां । मावळली द्वंद्वदुःखता[9] । उल्हासता वना धाडी ॥६०॥ मावळले संकल्प विकल्प । मावळलें द्वंद्वदुःख । श्रीराम वना जातां देख । परम हरिख कौसल्ये ॥६१॥ एकाजनार्दना शरण । कौसल्या करोनि नीराजन[10] । श्रीरामाचें वनप्रयाण । आल्हादें[11] आपण करविलें ॥६२॥ जें स्वस्त्ययन रघुनंदना । तेंचि स्वस्त्ययन लक्ष्मणा । कौसल्येनें करोनि जाणा । दोघे वना धाडिले ॥६३॥ लागोनि मातेच्या चरणा । तीसी करोनि प्रदक्षिणा । वेगें निघावया वना । निजभवना राम आला ॥६४॥ राज्याभिषेका श्रीराममूर्ती । गजरें येईल रघुपती । ओंवाळावया

---

शब्दार्थ - नरसिंह, २. दुष्टाला, ३. गाढ झोपेमध्ये, ४. वेदशास्त्रे, ५. इच्छा, तृप्ती, ६. गळा दाटून आला, ७. सुंदर मुख, ८. जीवात्मा आणि परमात्मा याहून वेगळा. ९. शीतोष्ण, सुखदुःख इत्यादिकांपासून, दुःख होण्याची स्थिती, १०. आरती, ११. कल्याणदायक

सीता सती । घेवोनि आरती तिष्ठत ॥६५॥ तंव देखिला रामचंद्र । नाही छत्र ना चामर । नाहीं द्विजांचा जयजयकार । नायके गजर वाद्यांचा ॥६६॥ चरणां लागोनियां सीता । आदरें पुसे श्रीरघुनाथा । राज्याभिषेक न देखूं माथां । विलंबता कां जाली ॥६७॥ अभिषेक नाहीं तत्वतां । राज्यावीण उल्हासता । देखतसें मी रघुनाथा । हे मज कथा सांगावी ॥६८॥ राहिलें राज्याभिषिंचन । अति दूर वनाभिगमन । तरी रघुनाथा नव्हेचि दुर्मन । उल्हास पूर्ण पितृवाक्यें ॥६९॥ एकाकी राम वना जातां । तेणें सुखावे कैकेयी माता । भाके उत्तीर्णता[१] दशरथा । तोचि रघुनाथा उल्हास ॥७०॥ श्रीराम म्हणे ऐक सीते । कैकेयीसी श्रीदशरथें । दोनी वरद दिधले होते । शुक्रविजयार्थें युद्धसंधीं ॥७१॥ शुक्रे रायाचा भंगिला रथ । कैकयीयें चक्रीं सूदला[२] हात । तेणें विजयी जाला दशरथ । तैं वरदार्थ वदला रावो ॥७२॥ तेचि कैकेयीयें वर दोन । आजि मागितले आपण । एक मजला वनाभिगमन । शीघ्र प्रयाण आजीच ॥७३॥ राज्यांतील अणुप्रमाण । कांही न घ्यावें आपण । हे रायाची आज्ञाप्रमाण । शीघ्रप्रयाण आजीच ॥७४॥ दुसरे वरदें रायापासीं । राज्याभिषेक भरतासी । तेही मर्यादा नवपंचवर्षीं[३] । मग आम्हांसी रामराज्य ॥७५॥ ऐसी जानकीये जाली कथा । मज वनवासीं निघणें आतां । गुरुपुष्य या सुमुहूर्ता । तुज तत्वतां पुसों आलों ॥७६॥

श्रीरामांचा सीतेला उपदेश : तूं कौसल्येपासीं । द्वेष न करावा कैकेयीसीं । हें गुह्य सांगतों तुजपासीं । तिचेनि आम्हांसी अति कीर्ति ॥७७॥ कैकेयीचें वरदान । ते मज जालें सुप्रसन्न । समुद्रीं तरतील पाषाण । हें महिमान तिचेनि ॥७८॥ इनें वना न दवडिलें । प्रतापभांडार मज दिधलें । त्रिभुवनीं रामराज्य जालें । इचेनि बोलें वनवासीं ॥७९॥ जाणोनिया ऐसा स्वार्था । मज उल्हास वना जातां । हें त्वां जाणोनि तत्वतां । कैकेयी सर्वथा द्वेशूं नको ॥८०॥ जैसीं लक्षुमीनारायण । तैसें सासूसासऱ्यां भावून[४] । सेवा करावी आपण । सावधान सद्भावें[५] ॥८१॥ सौमित्राची सखी जननी । कौसल्येहूनि अधिक मानीं । सुखीं करावी सेवा करूनी । अनुदिनीं निजभजनें ॥८२॥ माझी आज्ञा प्रमाण जैसी । भरताची आज्ञा मानीं तैसी । विकल्प न धरावा मानसीं । वरा[६] देवरासीं[७] भेद न मानीं ॥८३॥ माझी आज्ञा आहे ऐसी । तुवां न जावें माहेरासी । वेगळें न रहावें निजमंदिरासीं । कौसल्येपासीं नित्य वस्ती ॥८४॥ जंव होय माझें पुनरागमन । तंववरी करावें माझें ध्यान । मुखीं माझे नामस्मरण । विस्मरण येवों नेंदीं ॥८५॥ माझें ध्यान अहर्निशीं । उपमा नाहीं त्या सुखासी । माझेनि नामस्मरणें सुखी होसी । वियोगासी विसरोनी ॥८६॥

जानकीचे दुःख, तिची विनंती : ऐकोनि श्रीरामाचें वचन । हृदयीं लागला तो वाग्बाण । अश्रुपूर्ण झाले नयन । अधोवदन जानकी ॥८७॥ पतिवियोगाचें दुःख । तेणें कोरडें जालें मुख । हारपलें सकळ सुख । परम दुःख ओढवलें ॥८८॥ दुःखें जाली कासाविसी । मग लागली पतिपायासी । काय बोलिली श्रीरामासी । तें सावकाशीं अवधारा ॥८९॥ राज्यीं असतां श्रीरामासी । सेवा वांटिली सेवकांसी । तें मी एकली वनवासीं । सर्वस्वेसीं सेवीन ॥९०॥ सर्व सेवेचा निजस्वार्थ । मज लाभेल वनाआंत । सर्वज्ञ श्रीरघुनाथ । माझा मनोरथ पुरवावा ॥९१॥ मग बोलिला रघुनंदन । नेणसी वनवासाचें चिन्ह । वनवासीं दुःख दारुण । सावधान अवधारीं ॥९२॥ राज्यांतील अणुप्रमाण । घेवों नये वो आपण । त्यागोनियां वस्त्राभरण । पादत्राणें त्यागावीं ॥९३॥ वल्कलांचें वस्त्राभरण । कृष्णाजीन प्रावरण । तूं तंव सुकुमार पूर्ण । दुःख दारुण वनवासीं ॥९४॥ दंडकारण्य दुर्धर वन । तेथे वसावें आपण ।

---

शब्दार्थ – १. उतराई होणे, २. चाकात घातला, ३. चौदा वर्षांची, ४. कल्पून, ५. प्रेमपूर्वक, ६. पतीला, ७. दीराला.

पायीं चालतां कंटक पूर्ण । दुःख दारुण वनवासीं ॥९५॥ सिंह शार्दूळ व्याघ्र वृक । तरस तगर[1] मृग जंबुक । रीस वानर सर्प वृश्चिक । परम दुःख वनवासीं ॥९६॥ पतंग भृंग दंष्ट्री क्रूर । मकर सुसरी मत्स्य मगर । कंक बक पक्षी घोर । दुःख दुर्धर वनवासीं ॥९७॥ वनीं वनफळांचा आहार । तृणपर्णांचा सेजार[2] । शीत उष्ण निरंतर । दुःख दुर्धर वनवासीं ॥९८॥ तूं तंव रायाची राजबाळा । अतिशयेंसीं वेल्हाळा । नवीं द्वंद्वदुःखउमाळा[3] । तूं अबळा केंवि साहसी ॥९९॥

बाधेच्या भीतीचा सीतेकडून उपहास : ऐकोनि द्वंद्वबाधावचन । सीता झाली हास्यवदन । जवळी असतां रघुनंदन । द्वंद्वबंधन बाधीना ॥१००॥ करितां तुझें नामस्मरण । द्वंद्वदुःखाचें निर्दळण । तो तूं जवळी असतां जाण । द्वंद्वबंधन मज कैचें ॥१॥ वृक व्याघ्र पंचानन । त्यांचा आत्मा रघुनंदन । तो तूं जवळी असतां जाण । द्वंद्वबंधन मज कैचें ॥२॥ जवळी असतां रघुटिळक । कंटक होती निष्कटंक । विष तें होय पीयूख । परम सुख वनवासीं ॥३॥

पतिसहवासाचे महत्त्व, स्वतःला वनवासात नेण्याची सीतेची विनंती : तुजसांगातें वनवास । तो मज वैकुंठ कैलास । तुजवेगळा संसार ओस । दुःख असोस[4] मज तेव्हां ॥४॥ माझा स्वामी तू रघुनाथ । ऐक माझें मनोगत । तुजवेगळें जीवित । दुःखाभिभूत[5] संसारू ॥५॥ पति प्रियेचें निजजीवन । पति प्रियेचें निजनिधान[6] । पति प्रियेचें निजभूषण । तेणेंवीण ते अति दीन सुंदरा ॥६॥ पति प्रियेची निजमूर्ती । पति प्रियेची निजात्मगती । पति प्रियेची मुक्ती । होय उपहती[7] त्यावीण ॥७॥ पति प्रियेचें निजशोभन । पति प्रियेचें निजमंडण । पति प्रियेचें सौजन्य । तेणेंवीण ते अति दीन ॥८॥ पति प्रियेचें निजवैभव । पति प्रियेचें सुख स्वमेव । पति प्रियेचें नित्य गौरव । तेणेंवीण पहा हो अति दीन ॥९॥ तूं तूव माझा प्राणनाथ । तुजवेगळा मज प्राणांत । माझा परमात्मा रघुनाथ । हृदयस्थ अवधारीं ॥११०॥ जेव्हांचि तुझें वनप्रयाण । तुजसवें येती माझे प्राण । मागें मज राहिवतां जाण । अचुक मरण मज राम ॥११॥ कृपाळू तूं हृषीकेशी । ऐसीं बिरुदें तूं स्वयें वाहसी । तरी मज न्यावें वनासी । निजसेवेसी दासत्वा ॥१२॥ म्हणोनि धरिले दोन्ही चरण । गहिवरें गळताती नयन । जालें पतिपाद-प्रक्षाळण । श्रीराम पूर्ण तुष्टला ॥१३॥ कोणासही न पुसता । तुज म्यां सवें वना नेतां । म्हणतील स्त्रीजित कामलोलुपता[8] । वना सीता राम नेतो ॥१४॥ जेणें चुके लोकनिंद्यता । जेणें स्वार्थ साधे परमार्था । ऐसिया सांगेन निजस्वार्था । ते तुवां शीघ्रता करावें ॥१५॥ लौकिकें मानिजे सर्वांसी । स्वार्थ पाविजे परमार्थासीं । ऐसिया सांगेन निजगुह्यासी । त्या कार्यासी तूं साधीं ॥१६॥

सीतेला राम वसिष्ठाची आज्ञा घेण्यास सांगतात : भूत भविष्य वर्तमान । वसिष्ठाचे आहे ज्ञान । त्यासी रिघावें तुवां शरण । वनाभिगमन करावया ॥१७॥ रिघालिया सद्‌गुरूसी शरण । विघ्न तेंचि होय निर्विघ्न । गुरुवचन उल्लंघी ऐसा कोण । हरिहर पूर्ण वंदिती ॥१८॥ आज्ञा पुसलिया वसिष्ठासी । ना न म्हणवे दशरथासी । मजही नुल्लंघवे आज्ञेसी । गुरुवाक्य जगद्वंद्य ॥१९॥ जयाचिया जाण वचनासाठीं । सूर्यमंडळीं तपे छाटी । येवढा गुरू आमुचे गांठीं । हे गुह्य गोष्टी त्यासी पुसें ॥१२०॥

वसिष्ठांना विनंती केल्यावरून त्यांची अनुज्ञा मिळते : ऐकोनि श्रीरामाचें वचन । सीता हरिखली संपूर्ण । धरिले वसिष्ठाचे चरण । वनाभिगमनआज्ञार्थ ॥२१॥ मज न्यावया वनवासासी । आज्ञा द्यावी श्रीरामासी । तूं तंव हृदयस्थ जाणसी । सर्वज्ञ होसी गुरुवर्या ॥२२॥ वसिष्ठ

---

शब्दार्थ – १. रानडुक्कर वगैरे पशू, २. शय्या, अंथरुण, ३. शीतउष्ण इत्यादींचा त्रास, ४. सहन करण्यास त्रासदायक, ५. दुःखाने परिपूर्ण, ६. मोठा ठेवा, ७, नाश, ८. विषयासक्तीने.

म्हणे श्रीरघुनाथा । वना अवश्य न्यावी सीता । इचेनि पावसी पुरुषार्था । यश सर्वथा इचेनि ॥२३॥ सुरनर वानितील पवाडे । येवढी कीर्ति इचेनि जोडे । इयेसी घालोनियां पुढें । वना रोकडें निघावें ॥२४॥ कौसल्या म्हणे वनवासासी । श्रीरामा सीता न्यावी सरसी । येथे ठेवितां आम्हांपासी । देखतां इसी नित्य दु:ख ॥२५॥ स्त्रीपुरुषां वेगळेपण । हें तंव मरणापरीस मरण । हेंचि स्त्रियेसी दु:ख दारुण । पृथक् शयन पुरुषेंसीं ॥२६॥ अयोध्येचे जनांची वार्ता । जे श्रीरामें वनासी न्यावी सीता । वचन मानलें श्रीरघुनाथा । वना निजकांता नेऊं इच्छी ॥२७॥ बाप[1] श्रीरामाची करणी । सद्गुरुआज्ञा लाहोनी । लौकिक स्वयें संपादोनी । वना निजपत्नी नेऊं पाहे ॥२८॥ श्रीराम म्हणे सीतेसी । त्यजोनि वस्त्रांभूषणांसी । वल्कलांबरें परिधानेंसीं । वेगीं वनासी निघावें ॥२९॥ वस्त्राभरणें त्यागितां । उल्हास सीतेच्या निजचित्ता । धनधान्यादि वस्तुजाता[2] आणोनि रघुनाथापुढें ठेवी ॥१३०॥

लक्ष्मणाची विनंती : लक्ष्मण म्हणे रघुनाथा । तुम्ही सवें घेतली सीता । 'मीही वना येईन आतां । निजस्वार्था सेवावया ॥३१॥ श्रीराम म्हणे सौमित्रा । तूं मज निजाचा[3] सोयरा । मागें धरावया राज्यभारा । जवळी तिसरा दिसेना ॥३२॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । लक्ष्मणें मांडिलें निर्वाण । तुजवेगळा सांडीन प्राण । तुझी आण श्रीरामा ॥३३॥ वाहोनियां निर्वाण-आड । दृढ धरिलें श्रीरामचरण । सोडवितां न सोडी जाण । कळवळोनि बोलत ॥३४॥

स्त्रियांना प्रमदा का म्हणतात : तुम्ही दोघें वनवासी । आश्रमी सांडोनि सीतेसी । तूं जाशील वनफळासी । मागें इसी कोण रक्षी ॥३५॥ स्त्रियेसी मुळींहूनि रक्षण । माता संरक्षी बाळपण । कुमारपणीं पिता रक्षण । लग्न लाविलिया रक्षण सासूसासरे ॥३६॥ सासूसासरा भावे दीर । नणंदा जावादिकादि अपार । मुख्य रक्षण भर्तार[4] । तेणें निरंतर रक्षावी ॥३७॥ अरक्षणता[5] स्त्रियेसी । अनर्थ आला त्या घरासी । लांछन लावील त्या कुळासी । प्रमदा तिसी निजनाम ॥३८॥ प्रमादीं[6] पाडी पतिपुत्रांसी । प्रमादी पाडी कुळगोत्रासी । यालागीं प्रमदा नम तिसीं । वेदशास्त्रांसी संमत ॥३९॥

लक्ष्मणाचा बरोबर येण्याचा हट्ट : तुम्ही दोघें वनवासी । मी असलिया तुम्हांपासीं । आणीन फळमूळपुष्पांसी । अहर्निशीं रक्षण ॥१४०॥ तुझें वाहीन धनुष्यबाण । काष्ठें आणीन जीवन । तुम्हांसी करावया शयन । शेज करीन तृणपर्णीं ॥४१॥ तुझिया रंकाचाही रंक । मोलेंवीण मी सेवक[7] । वनवासींचा पाइक । विश्वासुक आंगवणा[8] ॥४२॥ वनीं एकली[9] सांडितां सीता । अनर्थ होईल रघुनाथा । हा विचार पुसावा समर्था । श्रीगुरुनाथा वसिष्ठासी ॥४३॥ लक्ष्मणाची निजयुक्ती । सत्य मानिली समस्तीं । एकली सीता वनाप्रती । ठेवितां निश्चितीं अनर्थ ॥४४॥

वसिष्ठांची अनुमती : ऐकोनि लक्ष्मणाचें वचन । वसिष्ठ आज्ञा दे सर्वज्ञ । तेणें खुणाविला रघुनंदन । वना लक्ष्मण स्वयें न्यावा ॥४५॥ ऐकोनि श्रीगुरुसंज्ञा । श्रीराम म्हणे लक्ष्मणा । जरी तुज येणें आहे वना । तरी धनधान्या वांटावें ॥४६॥ परिसतां श्रीरामाचें वचन । हर्षें निर्भर लक्ष्मण । एकाजनार्दना शरण । वनप्रयाण अवधारा ॥१४७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणें अयोध्याकांडे एकाकारटीकायां जानकीलक्ष्मणवनाभिगमनं नाम सप्तमोऽध्याय: ॥७॥ ओंव्या ॥१४७॥

---

**शब्दार्थ** – १. मोठी, अद्भुत, २. वस्तुसमूहाला, ३. जिव्हाळ्याचा, हृदयींचा, ४. पती, ५. असंरक्षण, स्वातंत्र्य, ६. मोहात, ७. चाकर, ८. स्वाभाविक, ९. एकाकी, कोणाच्या आश्रयाशिवाय.

# अध्याय आठवा

## श्रीरामांचे वनाकडे प्रयाण

॥ श्रीरामचंद्रगुरवे नमः ॥

रामस्त्वनेन वाक्येन सुप्रीतः प्रत्युवाच तम् । व्रजापृच्छस्व सौमित्रे सर्वमेव सुहृज्जनम् ॥१॥
ये च राज्ञे ददौ दिव्ये महात्मा वरुणः स्वयम् । जनकस्य महायज्ञे धनुषी रौद्रदर्शने ॥२॥
अभेद्ये कवचे दिव्ये तूणी चाक्षय्यसायकौ । सर्वमायुधमादाय क्षिप्रमाव्रज लक्ष्मण ॥३॥
स सुहृज्जनमामंत्र्य वनवासाय निश्चितः । इक्ष्वाकुगुरुमागम्य जग्राहायुधमुत्तमम् ॥४॥
तद्दिव्यं राजशार्दूलः संस्कृतं माल्यभूषितम् । रामाय दर्शयामास सौमित्रि : सर्वमायुधम् ॥५॥

श्रीराम लक्ष्मणाला मातेचा आशीर्वाद घेऊन आयुधे आणण्यास पाठवितात : श्रीराम म्हणे सौमित्रासी । जरी तूं वनवासासी येसी । तरी पुसोनि ये निजमातेसी । आणि पत्नीसी भेटोनि ॥१॥ आणिकही सुहृदसंबंधे । त्यांसी पुसोनि यावें यथावबोधें । माझीं आणावीं दिव्यायुधें । तीं अति शुद्धें युद्धार्थीं ॥२॥ मज दिधलें दशरथें । वरुणदत्त धनुष्यातें । तेणेसीं आणावे अक्षय भाते । अभेद्य कवचातें आणावें ॥३॥ शत्रुघातीं अति खडतर । अतिशयेंसीं सतेज धार । तेंही खर्ग[१] आणावें अति शीघ्र । आज्ञा गंभीर रामाची ॥४॥ सद्गुरू वसिष्ठाचे घरीं । माझे आयुधांची सामग्री । ते आणावी त्वरा करीं । वनांतरीं जावया ॥५॥ लक्ष्मण सांगे सुमित्रेसी । राम सीता जातातीं वनासी । मीही जातों त्याचे सेवेसी । म्हणोनि मातेसी वंदिलें ॥६॥ सुमित्रा म्हणे रामसेवा। करितां सुख माझे जीवा । वनीं सुखी केलिया राघवा । धन्य कुसवा तैं माझा ॥७॥ ज्येष्ठ बंधु सद्गुरू परम । ज्येष्ठबंधु पित्यासम । ज्येष्ठ बंधु आत्माराम । पुरुषोत्तम ज्येष्ठ बंधु ॥८॥ श्रीरामसेवा परम दान । श्रीरामसेवा परम ध्यान । श्रीरामसेवा परम सावधान । ब्रह्मज्ञान श्रीरामसेवा ॥९॥ श्रीरामसेवेचा करी आदर । तो सुखरूप नित्य नर। ऐसा मातेनें देवोनि वर । वना सौमित्र पाठविला ॥१०॥ यापरी वंदोनि जननी । निजपत्नीतें आश्वासुनी[२] । दिव्यायुधें सर्वे घेवोनी । आला धांवोनी सौमित्री ॥११॥ आला देखोनि सौमित्रासी । अति उल्हास स्वयें सीतेसी । परम सुख श्रीरामासी । धरिला पोटासीं आल्हादें ॥१२॥ जो त्यागी निजकांतेसी[३] । जो त्यागी वित्तविषयांसी । तोचि पढियंता[४] श्रीरामासी । जीवीं अहर्निशीं आवडता ॥१३॥

तमुवाचात्मवान्रामः प्रीत्या लक्ष्मणमागतम् । काले त्वमागतः सौम्य कांक्षिते मम लक्ष्मण ॥६॥
अहं प्रदातुमिच्छामि यदिदं मामकं धनम् । ब्राह्मणेभ्यस्तपस्विभ्यस्त्वया सह परंतप ॥७॥

श्रीराम, सीता व लक्ष्मण आपले सर्व धन ब्राह्मणांस व गरीबांस दान देतात : श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । यथाकाळीं शीघ्र आलासी । मी निजधन देईन दीनांसी । तूं त्या कार्यासी संपादीं ॥१४॥ तूं सखा साह्य वनवासी । तूं सखा निजधर्मासी । तू सखा साह्य निजकर्मासी । सहाकारी होसी सर्वार्थी ॥१५॥ माझें निःशेष निजधन । मी धर्मार्थ करितों दान । तें वाटावयाचें विधान । सावधान अवधारीं ॥१६॥ सर्वार्थी सखा साह्यातें । आधीं पुजावें वसिष्ठातें । सर्वस्व अर्पावें श्रीगुरूतें । हा मुख्य आमुतें स्वधर्म ॥१७॥ धन धान्य असंख्याक । धाडावे गाईंचे कळप अनेक । वस्त्रें अर्पावीं अमोलिक । रथ वारू अलोकिक । अर्पीं श्रीगुरूसी ॥१८॥ अनर्घ्य रत्नांचिया कोडी । भरोनि धाडाव्या कावडी । सद्गुरू पूजावा आवडीं । निजपरवडी धर्माची ॥१९॥ तुवां जावोन सांगातें । स्वयें अर्पावें सद्गुरूतें । सुयज्ञ ज्येष्ठपुत्र

---

शब्दार्थ - १.खड्ग, २. समाधान, संतुष्ट करून, ३. आपल्या स्त्रीला, ४. आवडता.

त्यातें । आणीं येथें प्रार्थोनि ॥२०॥ वसिष्ठासी द्यावें धन । ऐकोनि श्रीरामाचें वचन । लक्ष्मणासी हर्ष पूर्ण । जावोनि आपण गुरु पूजी ॥२१॥ वसिष्ठ बोले उल्हासेंसीं । त्रैलोक्य-विजय श्रीरामासी । म्हणोनि त्याची सुबुद्धि ऐसी । पूर्णभाग्यासी प्रकाशक ॥२२॥ मग जावोनि सुयज्ञघरांसी । सौमित्र वंदी सुयज्ञासी । श्रीराम जातो वनासी । तेणें भेटीसी बोलाविलें ॥२३॥ ऐकोनि श्रीरामाचें गमन । सुयज्ञ जाला उद्विग्नमन । लावोनियां दोनी नयन । ठेला आपण तटस्थ ॥२४॥ मग करोनियां संध्यावंदन । सुयज्ञ आला जी आपण । देखतांचि रघुनंदन । घाली लोटांगण सद्गुरुपुत्रा ॥२५॥ मधुपर्क विधिविधान । केलें यथोक्त[1] पूजन । आपलीं भूषणें रघुनंदन । करी समर्पण गुरुपुत्रा ॥२६॥ जडित कुंडलें रत्नमेखळा । बाहुभूषणें अनर्घ्य माळा । करकंकणें मुद्रिका सकळा । शृंगारिला गुरुपुत्र ॥२७॥ श्रीराम स्वयें सांगे सीतेसी । म्हणे तूंही पूजीं सुयज्ञासी । तिनेंही अनर्घ्य[2] अलंकारासी । दिधलें त्यासी उल्हासें ॥२८॥ वना जातां श्रीरामासरिसीं । परम आल्हाद सीतेसी । सर्वस्व देतां सुयज्ञासी । निजमानसीं उल्हास ॥२९॥ अमूल्य वस्त्रें सीतेंपाशीं । तींही दिधली सुयज्ञासी । जडितशय्या आस्तरणेंसीं । सहित दासी अर्पिल्या ॥३०॥ मातुळदत्त गज रामापासीं[3] । तो शृंगारोनि अलंकारेंसीं । त्यावरी बैसवोनि सुयज्ञासी । गज गजरेंसी बोळविला ॥३१॥ उल्हासें पूजी ना गुरूसी । जो भजेना सत्पात्रासी । तेंचि दूषण दात्यांसी । आम्हीं महाऋषी पूजावे ॥३२॥ श्रीराम सांगे सौमित्रासी । अगस्त्या शांडिल्या गार्ग्यऋषींसी । वामदेवादि कौशिकांसी । बहु धनराशी पाठवाव्या ॥३३॥ वेदपाठक अग्निहोत्री । सत्कर्माचार नित्यश्रोत्री । आगमिक[4] महामंत्री । द्रव्यसंभारीं पूजावे ॥३४॥ ऐसियांसी दिधल्या दान । तें तव अतिशयेंसीं पावन । सत्पात्र तें आहे आन । सावधान अवधारीं ॥३५॥

दान कोणास व कोणते द्यावे : अयाचित[5] भगवद्भावें । आवश्यदान त्यासी द्यावें । आपण जावोनियां सर्वे । धन अर्पावें याचकां ॥३६॥ कुटुंबवत्सल आणि निर्धन । बहु अपत्य अत्यंत दीन । त्याचें सुखी होय मन । इतुकें धन अर्पावें ॥३७॥ शिलवृत्ति आणि उंच्छवृत्ती[6] । जावोनि त्यांच्या गृहाप्रती । जितुकें द्रव्य ते मागती । तितुकें चतुर्गुणी तूं त्या देईं ॥३८॥ त्यांसी कैंचें साधन शाक । गोसहस्र सवत्सक । त्यांसी द्यावें आवश्यक । घृत दधि तक्र भोजनार्थ ॥३९॥ धन धान्य कौसल्येघरीं । आधीं द्यावें धर्माचारीं । संन्यासी मधुकरी करपात्री[7] । ब्रह्मचारी भिक्षार्थी ॥४०॥ कौसल्येचे निजसेवक । आणि तिचे उपासक । तैसेच सुमित्रेचे देख । धन अनेक त्यां देईं ॥४१॥ आमचे सुहृद आणि सेवक । परिचारिक आणि प्रेषक । कथाकथक[8] पुराणिक । द्रव्य अनेक त्यां द्यावें ॥४२॥ वार्तासूचक[9] आणि गंधलेपक । सभास्थानीं हास्यभाषक । ते पावती परम सुख । त्या आवश्यक धन देईं ॥४३॥ छत्रकार चामरधारी । हडपी[10] बारी[11] आणि व्यवहारी । जळप्राशक धूपी फुलारी । सुखी करीं द्रव्यदानें ॥४४॥ मल्ल दर्शनी नटनाटक । अश्ववाहक वस्त्रप्रक्षाळक[12] । रायविनोदी[13] उपहासक । शिल्पकारक सुखी करीं ॥४५॥ माझा सारथि चित्ररथ । त्यासी अर्पी अपार अर्थ । दीन दरिद्री जे जे समस्त । अर्थवंत ते करीं ॥४६॥ आमचे सखे सुहृद भक्त । जे कां आमचे नित्याश्रित । जे जे आम्हासी आर्तभूत । ते धनें समस्त सुखी करीं ॥४७॥ द्रव्य कांही ठेवणें नाही । निःशेष वेंचीं धर्मी सर्वही । आणिक जें जें लागेल कांही । तें तें पाहीं मी देईन ॥४८॥

---

शब्दार्थ - १.विधिपूर्वक, २. बहुमुल्य, ३. मोठ्या थाटाने, ४. वेदज्ञ, ५. याचना न करणारा, ६. शेत, मार्ग वगैरे ठिकाणी पडलेले धान्य जमवून त्यावर निर्वाह करणारे. ७. हात हेच ज्याचे पात्र असे ते, ८. हरिदास, ९. बातमी सांगणारे, १०. विडा देणारे, ११. छत्रधर, १२. धोबी, १३. नकलाकार, विनोदी बोलणारे.

**खजिन्यातील द्रव्याचा विनियोग :** मग पाचारोनियां भांडारी । म्हणे नि:शेष द्रव्य काढीं बाहेरी । त्याचिया विनियोगाची परी । ऐक निर्धारीं[1] सौमित्रा ॥४९॥ कृपण अनाथ अति दीन । अंध पंगु वृत्तिहीन । जे जे मागती तें त्यां द्यावें धन । अति सन्मानें सुखी करीं ॥५०॥ सुख उपजे दिधल्या दान । त्यांहूनि सुख दे सन्मान । तेणें सुखें सुखावे भगवान । ये विधीं दान अति श्रेष्ठ ॥५१॥ वृद्ध ब्राह्मण स्त्रिया तरुण । बहु बाळकेंसीं निर्धन । त्यांसी सन्मानें द्यावें धन । सूक्ष्मदान या नावें ॥५२॥ ऐशिया ब्राह्मणांचे ठायीं । सवत्सा आणि सुदोही[2] । सहस्र सहस्र अर्पी गाई । खिल्लारीं कांही उरों नेदीं ॥५३॥ माझें होय पुनरागमन । तंववरी खावया पुरे धन । ऐसें दीनांसी द्यावें दान । सनातन हा धर्म ॥५४॥ मज वना गेलियापाठीं । कोणीं न व्हावें कष्टी । कोणी न पडावें संकटीं । अगाध तुष्टीं[3] धन देई ॥५५॥ श्रीरामें आज्ञा दिधली जैसी । लक्ष्मण दे त्याहूनि विशेषीं । दान देतां लक्ष्मणासी । चौगुणा मानसीं उल्हास ॥५६॥

**सर्वस्वाचे दान करून दशरथाचा निरोप घेतात, लोकांचा विषाद :** नि:शेष वांटोनि धन । सीता श्रीराम आणि लक्ष्मण । करावया वनप्रयाण । निघालीं आपण राया पुसों ॥५७॥ राम सीता निघालीं बाहेरी । पाहों धांविन्नल्या नरनारी । एक चढले उपरीवरी । माडिया गोपुरीं पैं एक ॥५८॥ राम चालतां राजबिंदीं । सवें दाटली जनांची मांदी[4] । कैकेयीची दुष्ट बुद्धी । राजा निर्बुद्धि कां आयके ॥५९॥ रथ गज चतुरंगश्रेणी । राम गजरें जाय प्रतिदिनीं । तो श्रीराम आजि अनवाणी । जातो चरणीं वनवासा ॥६०॥ राम देखतांचि निवती नयन । राम देखतांचि निवे मन । राम देखतांचि निवे जन । जगज्जीवन श्रीराम ॥६१॥ राम जगाचें जीवन[5] । त्या जीवनीं जन मीन[6] । तो श्रीराम जातांचि जाण । जनांचे प्राण जातील कीं ॥६२॥ ऐसिया सुखरूप श्रीरामासी । दशरथ धाडितो वनासी । कैकेयीग्रहें घेतलें त्यासी । लागलें रायासी स्त्रीपिसें ॥६३॥ सीता सुकुमार महासती । इंद्रादि देव पाहों न शकती । तेहीं चरणीं चालता[7] क्षितीं । लोक देखती मार्गस्थ ॥६४॥ ऐसें बोलता जनांसी । तिघें अनुद्विग्न[8] मानसीं । वेगीं[9] आलीं राजगृहासी । दशरथासी पुसावया ॥६५॥ सुमंत प्रधान अति विश्वासी । तेणें सांगितलें रायासी । श्रीराम जातो वनवासासी । आज्ञा तुम्हांसी पुसों आला ॥६६॥ रामें वांटिलें निजधन । सेवक सुहृद आणि ब्राह्मण । सुखी केले दीन जन । वनप्रयाण सुमुहूर्तीं ॥६७॥ ऐकोनि सुमंताचें वचन । रायासी आलें पैं रुदन । जळो कैकेयीचें वदन । धाडी राम वनवासा ॥६८॥

**श्रीरामांनी वनाचा निर्धार बदलावा म्हणून दशरथाची विनंती :** श्रीराम देखतां दृष्टीं । राजा मूर्च्छित पडला सृष्टीं । रामे उठविला उठाउठीं । स्वयें थापटी पर्यंकीं ॥६९॥ राजा होवोनि सावधान । श्रीरामासी बोले आपण । नको करूं वनप्रयाण । माझा प्राण जाऊं पाहे ॥७०॥ कैकेयी ते मशक कोण । तुज मी राज्य देतों संपूर्ण । आतांचि करितों अभिषिंचन । ऋषिगणसमवेत ॥७१॥

**वचनभंग होईल म्हणून श्रीरामांचा नकार :** श्रीराम लागला पायांसी । नको करूं अभिषेकासी । मिथ्या करितां भाकेसी[10] । दोघें दोषी वेदोक्तें ॥७२॥ आतां मज राज्य घेतां । जग निंदील सर्वथा । तुझी भाक मिथ्या करितां । अध:पाता मी जाईन ॥७३॥ वेदवचन गुरुवचन । त्याहूनि अधिक पितृवचन । यावज्जन्म जो करी पाळण । त्याचें वचन अनुल्लंघ्य ॥७४॥ तुझे वचनें त्यागीन सीता । तुझें वचनें त्यागीन जीविता । परी वनवासाचिया निश्चितार्थां । मी सर्वथा त्यागींना ॥७५॥ माझा जरी जाईल प्राण । तरी त्यागीना वनप्रयाण । राया तुझी

---

शब्दार्थ – १. निश्चयपूर्वक, २. दुधाळ, ३. संतोषाने, ४. समूह, ५. पाणी, जल, ६. मासे, ७. जमिनीवरून, ८. खेदरहित, ९. सत्वर, १०. वचनाला.

वाहतों आण । म्हणोनि चरण दृढ धरिले ॥७६॥

श्रीरामांचा दृढ निश्चय पाहून राजा सैन्य बरोबर देण्यास सांगतो : देखोनि रामाचें निर्वाण । राजा करी दीर्घ रुदन । कैकेयीनें नागविलें पूर्ण । राम निधान अंतरलें ॥७७॥ न विचारितां निजकार्यासी । भाक देवों नये स्त्रियांसी । तेणें भाके गोंवोनि आम्हांसी । केला वनवासी श्रीराम ॥७८॥ श्रीरामाचें दृढपण[१] । वनभिगमनीं अति निर्वाण । रायें वृत्त जाणोन आपण । निजप्रधान आज्ञापिला ॥७९॥ सन्नद्ध[२] चतुरंगसेना । रामासवें द्यावी वना । वनीं वेंचावया रघुनंदना । असंख्य धना सवें देई ॥८०॥ उष्णों[३] पीडेल श्रीरामचंद्र । सवें देइजे छत्रचामर । कापडगृहे[४] अति विचित्र । देईं खिल्लार धेनूंचें ॥८१॥

कैकेयी क्रोधाविष्ट, त्यामुळे राजाचा संताप : ऐकोनि रायाचें वचन । कैकेयी जाली क्षोभायमान । आरक्त करोनियां नयन । काय आपण बोलिली ॥८२॥ घेवोनि उंसाच्या रसासी । बाकस[५] देइजे जेवीं दीनासी । लक्ष्मी देवोनियां रामासी । भरता देसी शून्य राज्य ॥८३॥ दावोनि गज[६] भद्रजाती[६] । दानसंकल्प द्विजाहातीं । त्यासी दीजे चित्रींचा हस्ती । ते गतीं राज्य देणें ॥८४॥ माझें म्हणतां काळें मुख । तुम्ही दुष्ट नष्टविवेक । मिथ्या करिता आपली भाक । निश्चयें नरक भोगाल ॥८५॥ कैकेयीचें कठिण वचन । ऐकोनि राजा कोपायमान । नष्ट दुष्ट तूं अति कठिण । वर्मीं[७] वाग्बाण विंधिसी ॥८६॥

सैन्यसंभार घेण्यास श्रीरामांचा विरोध : श्रीराम म्हणे स्वामी दशरथा । सेनासंपत्ति सांगातें घेतां । राज्यभार आला माझे माथां । तो सर्वथा मी नेघें ॥८७॥ गंगोदक अति शुद्ध । त्यामाजि पडलिया मद्यबिंद । अवघेंचि होय अविशुद्ध । तेवीं विरुद्ध दुष्टसंगे ॥८८॥ तुम्ही राज्य दिधलें भरता । त्यांतून अणुमात्रही घेतां । माझ्या वनवासाच्या व्रता । दोष तत्वतां लागेल ॥८९॥ ऐसें बोलतां श्रीरामासीं । कैकेयी वल्कलें दे त्यासी । वेगीं वेढोनि यांसी । शीघ्र वनासी निघावें ॥९०॥ सांडोनि वस्त्रें अलंकर । परिधान करावें वल्कलांबर । माथां धरोनि जटाभार । होई वनचर वनवासीं ॥९१॥ स्वयमेव देखतां दशरथ । वल्कलें वेढी श्रीरघुनाथ । लक्ष्मण येवोनि शीघ्र तेथ । स्वयें वेष्टित वल्कलें ॥९२॥ वल्कलें दिधली सीतेसी । तीं वेढितां नये तिसी । श्रीराम येवोनि तीपासीं । सुयुक्तीसीं नेसविलीं ॥९३॥ रामसौमित्रसीतेच्या वस्त्रांसी । कैकेयी घे आपणापासीं । देखोनि क्षोभ आला रायासी । अति निर्भर्त्सी कोपयोगें ॥९४॥

वसिष्ठगुरूंचा कोप व कैकेयीचा धिक्कार : कोप आला वसिष्ठासी । निर्भर्त्सिलें कैकेयीसी । नष्ट दुष्ट शठ तूं होसी । न लाजसी अति स्वार्थें ॥९५॥ तुझिया वरदाच्या नेमासीं । एकला एक राम वनवासी । तूं कां वल्कलें देतेसी सीतेसी । दुष्ट होसी दुर्भगा[९] ॥९६॥ वस्त्रें अळंकार त्यांचीं आतां । तूं कां घेसी सभेदेखतां । काळें वदन तुझें तत्वतां । मुख दावितां लाजसि ना ॥९७॥

दशरथाचा संताप : दुस्तर कोप दशरथा । कैकेयीसी मारूं धांवे लाता । तूं नव्हेसी माझी कांता । तुझा भर्ता मीं नव्हें ॥९८॥ माझ्या बाळांची घेसी लुगडीं । तूं तंव रामा[१०] हाटींची[११] धगडी[१२] । घरीं घातलीसे धांगडी । जाय रोकडी बैस हाटीं ॥९९॥ ऐसें क्रोधें बोलतां । गहिंवर आला दशरथा । पोटांसी धरोनियां सीता । होय अर्पिता आभरणें ॥१००॥

सीतेला वस्त्रसमर्पण : चौदा वर्षें वनवासीं । वस्त्राभरणें पुरती ऐसीं । तितुकीं द्यावीं सीतेसी ।

शब्दार्थ – १. निर्धार, २. सिद्ध, ३. सूर्याच्या तापाने, ४. तंबू, ५. चोयट्या, ६. उत्तम हत्ती, ७. मर्मस्थानी, ८. नेसावे, ९. भाग्यहीन, १०. स्त्री, ११. बाजारबसवी, १२. गोंधळ.

सुमंतासी आज्ञापिलें ॥१॥ वस्त्रें भूषणें सीतेजवळीं । सुमंतें दिधलीं ते काळी । दशरथा वंदी जनकबाळी । वंदी वेल्हाळी वसिष्ठासी ॥२॥ वसिष्ठें दिधलें आशीर्वचन । वनीं सतीत्वा पाळिसी पूर्ण । विजयी होईल रघुनंदन । तुज त्रिभुवन वंदील ॥३॥ राजा आज्ञापी सुमंता । शीघ्र आणीं माझिया रथा । बैसावया श्रीरघुनाथा । समेत[1] सीतसौमित्र ॥४॥

तिघांचे पित्यास वंदन; सर्वत्र शोकाकुल आक्रोश : रामलक्ष्मण प्रदक्षिणा । करोनि लागती पित्याचे चरणा । सात शतें माता जाणा । अभिवंदना तिहीं केलें ॥५॥ तंव तिहीं केला कोल्हाळ । अवघियांनी एकचि आरोळ । तंव राम निघाला तत्काळ । अति विव्हळ समस्तही ॥६॥ जातां देखोनि रघुनंदन । राजा पडिला मूर्च्छापन्न । रुदन करिती सकळही जन । दीनवदन अयोध्या ॥७॥ एकी माता कपाळ पिटिती । एकी दीर्घस्वरें हाका देती । एकी वक्षःस्थळें[2] ताडिती । पडल्या बहुती मूर्च्छिता ॥८॥ श्रीराम म्हणे येथें राहतां । अधिक वाढेल ममता । रथीं वाहोनियां[3] सीता । होय निघता तत्काळ ॥९॥ आक्रंदोनि आरडे निजमाता । म्हणे मुख पाहों दे रघुनाथा । केंवी मी देखेन मागुता । वदन श्रीरामा दाखवीं ॥११०॥ येई येईं रे माझ्या श्रीरामा । मनमोहना मेघश्यामा । विव्हळ सांडोनियां आम्हां । वना दुर्गमा केंवी जासी ॥११॥ तुज निघतां बा रे वना । मज आला प्रेमाचा पान्हा । कोणासी पाजूं रघुनंदना । निजवदना मज दावीं ॥१२॥ वना जातां रघुनंदन । गायींचे गळती लोचन । अश्व गज करिती रुदन । दुःखें पाषाण उलताती ॥१३॥ डोहींचें आटतां जीवन । जेंवी तळमळती मीन । तेंवी अयोध्येचे जन । श्रीरामेंवीण तळमळती ॥१४॥ कैकेयी ते अति कठिण । सीतेचें हरी वस्त्राभरण । तीखालें[4] येथें राहे कोण । करूं प्रयाण वनवास ॥१५॥

तिघांमागून सर्व नागरिक जातात : निघाले ज्योतिषी वेदपाठक । निघाले अग्निहोत्री साग्निक । त्यांचिये समागमे देख । एक एक निघाले ॥१६॥ सुतार कुंभार नापिक । निघाले ते नटनाटक । रजक रंगारी चार्मिक[5] । अनामिक[6] निघाले ॥१७॥ निघाले भुसी साळी माळी । चाटी[7] भाटी तेली तांबोळी । कोष्टी[8] सोनार शिंपी गोवळी । कोळी माळी निघाले ॥१८॥ कैकेयी ती दुष्टबाधा । ती आम्हांसी पीडील सर्वदा । जिकडे राम तिकडे अयोध्या । सर्वांची श्रद्धा वनवासी ॥१९॥ श्रीराम जंव मार्गे पाहे । तंव नगरजन धांवती लवलाहें । राम सुमंतासी म्हणे राहें । जनसमुदाय केंवी येती ॥१२०॥

नागरिकांना अयोध्येत परतून जाण्याची श्रीरामांची विनंती : श्रीराम स्वयें विनवी जन । दंड कारण्या मज गमन । दूरस्थ पंथ अति कठिण । तुम्हां आगमन तेथें नव्हे ॥२१॥ कृपा करोनियां मजवरी । तुम्हीं राहावें निजनगरीं । राजा दशरथ आहे शिरीं । सुखोद्गारीं[9] नांदावें ॥२२॥ माझी आज्ञा पाळील भरत । तुम्हीं राहावें सुनिश्चित । ऐसें सांगोनि रघुनाथ । जन समस्त राहविले ॥२३॥ माझें स्मरण जया अहर्निशीं । मी अखंड तयापासीं । मज न विसरावें निजमानसीं । मी तुम्हांपासीं सर्वदा ॥२४॥ यापरी राहवोनियां जन । श्रीराम करी वनाभिगमन । एकाजनार्दना शरण । पुढे निरूपण रसाळ ॥२५॥ रसाळ कथा रामायणी । वदली वाल्मीकाची वाणी । एका शरण जनार्दनीं । कृपासज्जनीं करावी ॥२६॥ स्तस्तिश्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामवनाभिगमनं नाम अष्टमोऽध्यायः ॥८॥ ओव्या ॥१२६॥

---

शब्दार्थ - १ बरोबर, २. छात्या, ३. घेऊन, ४. तिच्या हाताखाली, ५. चांभार, ६. महार, ७. कापडाचे व्यापारी, ८. कापड विणणारे, ९. आनंदाने.

# अध्याय नववा

## श्रीरामांचे चित्रकूटावर गमन

श्रीरामांच्या प्रयाणानंतर दशरथ व राण्या त्यांच्या मागून धावत जातात : श्रीरामाय जगदानंदकंदाय नमः ॥ वना निघतां श्रीरघुनाथ । राजा महामोहें मूर्च्छित । तो होवोनियां सावचित्त । पुसे दशरथ राम कोठें ॥१॥ त्यासी स्त्रिया सांगती मात[1] । तुम्हीं दिधला निजरथ । त्यावरी बैसोनि रघुनाथ । गेला निश्चित वनवासा ॥२॥ एक सांगती रायासी । राम आश्वासीत जनांसी । आहे नगरद्वारापासीं । तंव राव वेगेंसीं धाविंनला ॥३॥

अथ राजा वृतः स्त्रीभिः सद्भिजो दीनमानसः । निर्जगाम प्रियं पुत्रं द्रक्ष्यामि च वनं गतम् ॥१॥

सातशें राणियांसमवेत । धाविंनला दशरथ । कोठें कोठे माझा रघुनाथ । स्वयें पुसत सर्वांतें ॥४॥ मग आक्रंदें दिधली हाक । श्रीरामा दाखवींरे निजमुख । तुज जालिया विमुख । परम दुःख सर्वांसी ॥५॥ कैकयीयें घेवोनि भाक । मज दिधलें महादुःख । तुझे देखिलिया श्रीमुख । परम सुख मज होय ॥६॥ श्रीराम स्मरतां हृदयांत । सकळ दुःखांचा होय अंत । भाग्यें अभागी मी दशरथ । वना रघुनाथ धाडिला ॥७॥ धांव पावें गा राघवा । भेटी देई परम कणवा[2] । सुख होईल माझ्या जीवा । म्हणोनि धांवा[3] पोकारिला[3] ॥८॥ गेला गेला रे रघुनाथ । म्हणोनि आक्रंदें गर्जत । रडत पडत स्वयें धांवत । पडे मूर्च्छित अति दुःखी ॥९॥ राम म्हणे येथें राहतां । दृढ वाढेल मोहममता । रावा मजपासीं न येतां । वेगीं सुमंता रथ हाकीं ॥१०॥ श्रीराम नयेचि परतोनी । दशरथ रथ देखे नयनीं । दृष्टी मुरडेना तेथोनी । ठेली जडोनी रामरूपीं ॥११॥

यावत्तु निर्यतस्तस्य रजोरूपमदृश्यत । तावद्व्यवर्धतिवास्य धरण्यां पुत्रदर्शने ॥२॥
तदार्तश्च विषण्णश्च पपात धरणीतले ॥

सर्वांचा विलाप : श्रीराम देखतां दृष्टीं । दृष्टी लागली रामापाठीं । श्रीराम न देखतां दृष्टीं । बैसली शेवटी ध्वजस्तंभी ॥१२॥ दृष्टी अंतरलिया ध्वज । राजा पाहे रथाचें रज[4] । न देखतां श्रीरामाचें रज । पडे भूभुज[5] मूर्च्छित ॥१३॥ आठवितां श्रीरामासी । राजा विसरे निजदेहासी । तेणें मूर्च्छा आली त्यासी । देहभावासी विसरला ॥१४॥ स्त्रिया करिती दीर्घ रुदन । रुदन करिती सकळ जन । गाई न सेविती तृणजीवन[6] । वत्स स्तनपान न करिती ॥१५॥ अश्व न खाती चारापाणी । गज निजकवळ न घालिती वदनीं । आहार त्यजिला पौरजनीं । अयोध्याभुवनीं आकांत ॥१६॥ दिवस गेला अस्तमानीं । राजा सावध केला राणियांनीं । प्रवेशतां अयोध्याभुवनीं । सुख स्वप्नीं दिसेना ॥१७॥ दीपदीपिका नाहीं कोठें । ओस हाटबटिया[7] चौहटे[8] । जो तो रडतचि वाटे । श्रीराम कोठें पुसताती ॥१८॥ श्रीराम प्रवेशलिया वनीं । घरोघरीं दीर्घ रडणी । अंदरोळ[9] पडला अयोध्याभुवनीं । अन्न कोणी न खाय ॥१९॥

वसिष्ठांनी धीर दिल्यावर सर्वजण अयोध्येकडे परत फिरतात : न साहवे श्रीरामवियोगदुःख । राजा राणिया सकळ लोक । अवघे म्हणती घेवों विख । वसिष्ठें देख निवारिलें ॥२०॥ चौदा वर्षे वनवासीं । रामी क्रमील निमेषार्धैसीं । लाहोनि[10] त्रिभुवनशयासी । अयोध्येसी येईल ॥२१॥ मारोनि राक्षसांच्या क्रोडी । सोडवोनि देवांची बांदवडी । उभवोनि रामराज्याची गुढी[11] । येईल तांतडी[12] श्रीराम ॥२२॥ माझें वचन माना प्रमाण । वाहतों श्रीरामाची आण । विष घेवोनि देतां प्राण । अधःपतन पावाल ॥२३॥ ऐकोनि वसिष्ठाची वाणी । राजा प्रवेशला

---

शब्दार्थ - १. गोष्ट, २. कृपेने, ३. करुणा भाकली, आक्रोश केला, ४. धुराळा, ५. (दशरथ) राजा, ६. गवत आणि पाणी, ७. बाजार, ८. चवाठे, ९. आरडाओरडा, १०. मिळवून, ११. ध्वज, १२. सत्वर.

राजभवनीं । श्रीराम आठवितां मनीं । पडला धरणीं मूर्च्छित ॥२४॥

**ब्राह्मण श्रीरामांच्या मागून धावत जातात :** येरीकडे श्रीराम आपण । शीघ्र करितां वनप्रयाण । पाठीं लागले ब्राह्मण । राहविल्या जाण न राहती ॥२५॥ रामें रथ पेलिला[1] उठाउठीं । द्विज धांवती पाठोपाठीं । श्रीरामाची प्रीती मोठी । प्रेम पोटीं अनिवार ॥२६॥

चकर्षेव गुणैर्बद्धं जनं पुरनिवासिनम् ॥३॥

ते द्विजास्त्रिविधं वृद्धा ज्ञानेन वयसौजसा । वय:प्रकंपशिरसो दूराद्रूचुरिदं वच: ॥४॥

वहंतो जवना रामं भो भो जात्यास्तुरंगमा: । उपवाह्यस्तु वो भर्ता नापवाह्य: पुराद्वनम् ॥५॥

एवमार्तप्रलापांस्तान्वृद्धानप्रलपतो द्विजान् । अवेक्ष्य सहसा रामो रथादवततार ह ॥६॥

श्रीरामांच्या संगतीं । वनवासीं करावया वस्ती । दृष्टी ठेवोनियां रथीं । ब्राह्मण धांवती लवलाहें ॥२७॥ वृद्ध वृद्ध वेदपाठक। तपस्वी अग्निहोत्री याज्ञिक । आणिकही बहुसाल लोक। मोठेनि हांक तिहीं दिधली ॥२८॥ शीघ्र नेतां श्रीरामासी । शरण रथाच्या वारुवासीं[2]। राम आणावा आम्हांपासीं। वेगीं वनवासीं न न्यावा ॥२९॥ रथ चालवितो अलोलिक । त्या सारथियासी नमन देख। रथ पेलावा नगरासन्मुख । वना श्रीराम न न्यावा ॥३०॥ श्रीराम जंव मागें पाहे । तंव जनसमुदाय धांवताहे । उडी टाकोनि लवलाहें । वंदोनि पाये बोलत ॥३१॥ स्वामी कष्टलेती बहुत दुरी । म्हणोनि द्विजांचे चरण चुरी । वनवास दंडकारण्यामाझारी । तुम्ही कैशापरी याल तेथें ॥३२॥ श्रीरामा तुझिया संगतीं । आम्ही पावों ब्रह्मप्राप्ती । वनवास तो बापुडा किती । भय निश्चितीं आम्हां नाहीं ॥३३॥ परतोनि जाणें मागुती । निश्चय आम्हां नाहीं रघुपती । स्वामीनें न्यावें वनाप्रती । वनसांगाती वनवासीं ॥३४॥ तूं जैं सांडोनि जासील दुरी । तैं आम्ही होऊ रानभरी । आम्हांवरी कृपा करीं । दीनोद्धारीं चालावें ॥३५॥ ऐकोनियां द्विजोक्ती । श्रीराम विचारी पैं चित्तीं। हे निजनगरासी स्वयें जाती । ऐसी युक्ती योजावी ॥३६॥ श्रीराम लक्ष्मणा आज्ञा करी । म्हणे चालतां द्विज शिणले भारी । आजि वस्ती तमसातीरीं । सीता उतरीं वृक्षातळीं ॥३७॥ श्रीराम नेघेचि पैं अन्न। अवघीं केलें अंबुप्राशन[3] । सीतेसहित आपण । केलें शयन तृणशय्ये ॥३८॥ श्रीराम सांगे लक्ष्मणाप्रती । ब्राह्मण राहवितां न राहती । हे जंव निजेलें आहेती । तंव शीघ्रगतीं निघावें ॥३९॥ सुमंत रथ सिद्ध करी । मार्ग दाविला अयोध्यामोहरी[4] । रिघोनि तमसेमाझारीं । परतीरीं उतरलें ॥४०॥ ब्राह्मण प्रत:काळीं पाहती । माग देखिला अयोध्येप्रती । उल्हासें अवघे नगरा येती । तंव रघुपती पुढें गेला ॥४१॥ तयांसी पुसती नगरस्थ । कोठे आहे श्रीरघुनाथ । ते म्हणती राम आला येथ । जन हांसत ब्राह्मणांसी ॥४२॥ बहुतां पाडोनियां भ्रांती । श्रीराम गेला हातोहातीं । श्रीरामाची अगम्य गती । न कळे वेदोक्ती ब्राह्मणां ॥४३॥ हृदयीं असतां आत्माराम । जनांसी पडला मोहभ्रम । अवघे जाले विषयकाम[5] । कल्पांती राम न भेटे ॥४४॥ फुकाचें जे रामनाम । नुच्चारिती ते अभागी परम । असो ते पावती अंधतम[6] । जे आत्माराम नाठविती ॥४५॥

**गुहकाचे भागीरथीच्या तीरावर आगमन :** असो हें येरीकडे रघुपती । दुसरे दिवसीं दिनांतीं[7] । इंगुदीवृक्षीं केली वस्ती । निकट भागीरथीप्रवाहो ॥४६॥ वना आलिया श्रीराममूर्ती । ऐकोनि गुहक निषादपती[8]। भेटों आला अति प्रीतीं । घातलें क्षितीं लोटांगण ॥४७॥ देखतां श्रीरामाचें मुख । गुहका जाला परम हरिख । रामें आलिंगतां देख । द्वंद्वदु:ख विसरला ॥४८॥ विसरला

---

शब्दार्थ - १. चालविला, २. घोड्यांना, ३. उदकप्राशन, ४. अयाध्येकडे, ५. विषयेच्छू, ६. नरकविशेष, ७. संध्याकाळी, ८. कोळ्यांचा राजा.

धर्म अधर्म । विसरला अधम उत्तम । सद्भावें देखतां श्रीराम । रणजन्म विसरला ॥४९॥ विसरला कर्मकर्तेपण । विसरलासे मीतूंपण । देखतां श्रीरामाचे चरण । समाधान गुहकासी ॥५०॥ करितां श्रीरामनामस्मरण । समूळ निर्दे जन्ममरण । त्यांचे देखतां श्रीचरण । बोळवण[1] भवभावा[2] ॥५१॥ गुहकें आणिला फळसंभार । राम न करीच फळाहार । करोनि जळाचा जळाहार । केला सेजार वृक्षमूळीं ॥५२॥ केला सीतेसी सेजार[3] । निद्रा न करीच सौमित्र । सावधान अहोरात्र । सेवेसी तत्पर श्रीरामीं ॥५३॥ श्रीराम गुहक एकांतीं । संवाद करिती अति प्रीतीं । निमेषार्धे गेली राती । जाली प्राप्ती अरुणोदया ॥५४॥

पुढे प्रयाण करतेवेळी तेथूनच सुमंताला परत पाठविला : श्रीराम म्हणे गुहकासी । वेगीं आणवीं नौकेसी । जाणें आहे परतीरासी । आजि वस्ती प्रयागीं ॥५५॥ सुमंतें सज्ज केला रथ । तयासी बोले श्रीरघुनाथ । आतां येथोनियां परत । जावें त्वरित अयोध्ये ॥५६॥ तमसातीरींहून रथ । परतवावा हा निश्चितार्थ । ब्राह्मणसंगाच्या त्यागार्थ । तुज येथपर्यंत आणिलें ॥५७॥

सुमंताची विनंती : ऐकोनि श्रीरामाचें वचन । सुमंत पडला मूर्च्छापन्न । दीर्घ आक्रंदे करी रुदन । राम सच्चिद्घन अंतरला ॥५८॥ रिता देखोनियां रथ । होईल अयोध्येसी आकांत । प्राण सांडील दशरथ । नको तेथें मज धाडूं ॥५९॥ तुज सांडोनि रघुनाथा । अयोध्येमाजि मज जातां । सुख न[4] पवें[4]गा सर्वथा । चरणीं माथा ठेविला ॥६०॥ कृपा करीं श्रीरघुपती । मी येईन वनाप्रती । सेवा करीन अहोरात्रीं । विघ्नें रथगतीं वारीन ॥६१॥

श्रीरामांचे उत्तर : श्रीराम म्हणे गा सुमंता । गुज सांगेन मी तुज आतां । तुज अयोध्येसी नवजातां[5] । कैकेयी दशरथा पीडील ॥६२॥ रायें देवोनियां रथ । कोठें धाडिला रघुनाथ । माझेनि रागें दशरथ । करवील घात भरताचा ॥६३॥ पायीं जावें वनवासासी । साक्षेपें[6] रथ का दिधला त्यासी । मारावया भरतासी । रायें रामासी पाठविलें ॥६४॥ भरता मारविलियापाठीं । राम बैसवावा राज्यपटीं । विकल्प[7] कैकयीच्या पोटीं । तो तूं गेलियापाठीं सांडील ॥६५॥ रितें देखोनियां रथासी । राम जाला वनवासी । सत्य मानेल कैकेयीसी । या कार्यासी तूं जायीं ॥६६॥ माझी आज्ञा आहे ऐशी । तुवां जावें अयोध्येसी । दशरथ आणि कौसल्येसी । सुख उपदेशीं ब्राह्मणां ॥६७॥ वचन ऐकोनियां सांकडे । सुमंत संकोचला रडे । कांही न बोलवेचि पुढें । रथेंसीं मुरडे अति दुःखी ॥६८॥

गुहकाकडून झाडाचा चीक आणवून जटाबंधन : श्रीराम बोलिला उत्तर । गुहका आणवी न्यग्रोधक्षीर[8] । वेगीं बांधावा जटाभार । रामसौमित्र वनवासी ॥६९॥ गुहकें आणोनियां क्षीर । जटामुकुट अति सुंदर । दोघांचे बांधिले मनोहर । राम सौमित्र शोभती ॥७०॥ आज्ञा देवोनि सुमंतासी । श्रीराम आला नावेपासीं । वेगीं बैसवोनि सौमित्रासी । सीता त्यापासी बैसविली ॥७१॥

गुहकाच्या आईची प्रार्थना : श्रीराम नावेसी बैसतां । आक्रंदें गर्जे निषादमाता । आम्हा समस्तांच्या घाता । श्रीरघुनाथा करूं नको ॥७२॥ तुझी लीला अगाध गहन । नेणो श्रीराममहिमान । चरणीं उद्धरिले पाषाण । जड्तारण[8] श्रीराम ॥७३॥ नावेवरी आमुचे जिणें । ते उद्धरेल तुझेनि चरणें । मग आम्हीं काय करणें । येणें जाणे खुंटलें ॥७४॥

क्षालयामि तव पादपंकजं नाथ दारु दृषदोः किमंतरम् ।
मानुषीकरणचूर्णमस्ति ते पादयोरिती कथा प्रथीयसी ॥७॥

---

शब्दार्थ – १. पाठवणी, २. सांसारिक उपाधींना, ३. शय्या, ४. मला मिळणार नाही. ५. न जाता, ६. लोभाने, ७. संशय, ८. वटवृक्षाचा चीक, अचेतन वस्तू सचेतन करणारा.

ऐसे अगाध तुझे चरण । तुझे पदींचे रज:कण । लागतां जडाचें उद्धरण । त्यांचे क्षाळण करीन मी ॥७५॥

**श्रीरामांना संतोष :** देखोनि निषादीचा भावो । संतोषला श्रीरामरावो । दीन उद्धरावया पाहों । वनीं निर्वाहो श्रीरामा ॥७६॥ करावया दीनोद्धारण । श्रीरामाचे वनप्रयाण । एकाजनार्दना शरण । भवतारण श्रीराम ॥७७॥

**गंगापार होऊन त्रिरात्र मुक्काम, त्रिवेणीदर्शन, गंगायमुनेस आनंद :** यापरी श्रीरामचंद्र । उतरोनियां गंगापार । श्रीराम सीता सौमित्र । तिघे एकत्र निघाली ॥७८॥ पुढें पद्मपुष्करिणी । तेथें त्रिरात्रीं वसोनी । कमळकिंजल्क[1] सेवूनी । प्रभातीं त्रिवेणी पावतीं जालीं ॥७९॥ राम लक्ष्मण सीता तिन्ही । देखोनियां श्रीत्रिवेणी । उल्हास गंगेच्या मनीं । श्रीरामचरणीं विनटावया[2] ॥८०॥ गंगा म्हणे माझें भाग्य गहन[3]। यमुना म्हणे मी अति पावन । सरस्वती म्हणे मी धन्य । श्रीरामचरणस्पर्शनीं ॥८१॥ लागतां श्रीरामाच्या चरणीं । आम्ही पावन तिघी जणी । म्हणोनि आनंदली त्रिवेणी । तिघी जणी सनाथ ॥८२॥ प्रयोग करोनियां पावन । सीतासमवेत लक्ष्मण । श्रीराम करी संध्यास्नान । जपविधान यथोक्त[4] ॥८३॥

**नित्यविधी उरकून भरद्वाजाश्रमास गमन, तिथेच राहण्याबद्दल ऋषींचा आग्रह :** श्रीराम लक्ष्मण सीतेसहित । भरद्वाजाश्रमा येत । ऋषीनें देखोनि श्रीरघुनाथ । आला धांवत सामोरा ॥८४॥ स्वयें श्रीराम आपण केलें साष्टांगीं नमन । सौमित्रें घातलें लोटांगण । वंदिले चरण जानकीनें ॥८५॥ आला देखोनि रघुनाथ । आनंद भारद्वाजा अद्भुत । आजि माझें कुळ पुनीत । पितर तृप्त आजि माझे ॥८६॥

अद्य न: पितरस्तृप्ता अद्य न: पावितं कुलम् । अद्य नो वंशजा: सर्वे यद्भवान्गृमागत:

आजि माझा वंश धन्य । अजि माझा आश्रम पावन । आजि माझे याग संपूर्ण । सफळ ध्यान अजि माझें ॥८७॥ आजि माझे धन्य नयन । आजि विश्रांतीस आलें समाधान । झालीं ध्येय ध्याता ध्यान संपन्न । श्रीरामचरण देखोनी ॥८८॥ स्वभावें देखतां रघुपती । ज्ञानेंसीं विज्ञानाची प्राप्ती । आजि जीवशिवासी विश्रांती । श्रीराममूर्ती देखोनी ॥८९॥ हर्षे करितां स्तवन । अश्रुपूर्ण जाले नयन । हृदयीं धरितां रघुनंदन । समाधान ऋषिवर्या[5] ॥९०॥ ऋषि पावोनि समाधान । केलें अर्घ्यपाद्यादि पूजन । फळें आणोनि संपूर्ण । दिधलें भोजन फळाहार ॥९१॥ ऋषि सद्भावें निर्मळ । श्रीरामीं अर्पिता फळ । देहगेह रामाचे केवळ । सुफळीं सकळ श्रीराम ॥९२॥ ऐसी सर्व समाधि असतां । धणी[6] न पुरे ऋषीच्या चित्ता । श्रीरामसेवासुख सेवितां । समाधिअवस्था ते तुच्छ ॥९३॥ ऋषि म्हणे श्रीरामासी । दूरी वनवासा तूं कां जासी । प्रयाग तीर्थरावो सर्व तीर्थांसी । चौदा वर्षे येथेच राहें ॥९४॥

**आपण राहिल्यामुळे अयोध्येचे नागरिक येऊन शांतिभंग होईल वगैरे अडचणींचा निर्देश :** श्रीराम म्हणे ऋषिनाथा । मज निश्चयें येथे राहता । अयाध्येच्या प्रजा समस्ता । देखोनि समीपता धांवतील ॥९५॥ चुकवोनि आलों मी द्विजगण । अवश्य येतील ते ब्राह्मण । स्त्रिया वृद्ध अति दीन । समस्त जन येतील ॥९६॥ येतील पुरोहित प्रधान । येतील नटनाटकगण । वारांगना येतील संपूर्ण । सेवक जाण येतील ॥९७॥ श्रीरामभेटी आणि प्रयागस्नान । पर्वकाळ अति पावन । जनक येईल धांवोन । सीताभिगमन[7] माहेरा ॥९८॥ सीता कां नेतां वनवासीं । इसी धाडावें माहेरासी । म्यां काय बोलावें जनकासी । वनवासासी मुख्य विघ्न ॥९९॥ येथे

शब्दार्थ - १. यथासांग, २. अनुभवज्ञानाची, ३. तृप्ती, ४. जवळपणा, ५. ब्राह्मणसमुदाय, ६. वेश्या, ७. सीतेचे जाणे.

येईल दशरथ । तेव्हा भाक होईल व्यर्थ । यालागीं येथोनियां गुप्त । जावें दूर वनवासा ॥१००॥

ते भारद्वाजांनी मान्य करून चित्रकूटाचे नाव सुचविले : ऋषि म्हणे सत्य वचनार्थ । येथोनि चित्रकूट पर्वत । पुष्पीं फळीं प्रफुल्लित । त्या वनांत तुम्हीं राहावे ॥१॥ तो पर्वत पुण्यशीळ । जननिवासापरीसं[१] निर्मळ । वृक्ष तेथें सदाफळ । सुख पावाल सर्वही ॥२॥ मार्गी सिद्धवट[२] विख्यात । त्यासी वंदावें भावयुक्त । त्याचेनि सफळित पुरुषार्थ । निर्विघ्नार्थ वंदावा ॥३॥

सिद्धवटदर्शन, सीतेची प्रार्थना : मग करोनि भारद्वाजा नमन । तिघीं जणीं केलें प्रयाण । ऋषि बोळवित आपण । अर्ध योजन स्वयें आला ॥४॥ रामें ऋषीस राहवोनी । तिघें यमुनेतें उतरोनी । पाहत शोभा नवकाननीं । आलीं ठाकोनी सिद्धवटा ॥५॥ अनंत शाखा अति सरळी । तिघें आलीं तया तळीं । रामसौमित्रें वंदिला निढळीं[३] । सीता वटातळीं स्वयें बोले ॥६॥ वनीं विजयी रघुनंदन । निर्विघ्न आमुचें पुनरागमन । जालिया देईन लक्ष गोदान । द्विजां भोजन लक्षसंख्य ॥७॥ वटीं वसे वटसावित्री । तिसीं पूजीन अलंकारवस्त्रीं । ऐसे बोलोनि सीता सुंदरी । नमस्कारी वटातें ॥८॥

चित्रकूटी आगमन : तेथोनियां शीघ्रवत । पावलीं चित्रकूट पर्वत । शोभा देखोनि अत्यद्भुत । श्रीरघुनाथ सुखावला ॥९॥ पर्वत देखोनि शोभायमान । मार्गश्रमा जाली बोळवण । तीं तिघें जालीं सुखसंपन्न । येथे आपण राहावें ॥११०॥

आश्रम बांधण्याची लक्ष्मणाला आज्ञा : राम म्हणे सौमित्रासी । वेगीं रचावें आश्रमासी । आणोनि गजभग्नवृक्षांसी[४] । पर्णशाळेसी निर्मावें ॥११॥ श्रीरामाचें निजसेजार । रचिलें अति मनोहर । दुसरी शाळा सविस्तर । ऋषीश्वररहिवासा ॥१२॥ आणोनियां जळफळांसी । सौमित्र अर्पी सीतेपासी । जागृत राहे अहर्निशीं । रामसेवेसी निवटला ॥१३॥ मुखीं नित्य श्रीरामनाम । सर्व इंद्रियीं श्रीराम कर्म । हृदयीं परमात्मा श्रीराम । भक्तोत्तम सौमित्र ॥१४॥ श्रीरामसेवा अति निर्वाण[५] । लक्ष्मणासी फावली पूर्ण । एकाजनार्दना शरण । भरतागमन अवधारा ॥१५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामसीता-लक्ष्मणचित्रकूटपर्वतगमनं नाम नवमोऽध्यायः ॥९॥ ओव्या ॥११५॥ श्लोक ॥८॥ एवं ॥१२३॥

## अध्याय दहावा

### दशरथाचे प्राणोत्क्रमण

**गुहकाकडे सुमंताचा मुक्काम :** श्रीसीतारामाभ्यां नमः । येरीकडे सुमंत गुहक । श्रीराम गेलियावरी देख । रामविरहें पावले दुःख । तोचि श्लोक अवधारा ॥१॥

**कथयित्वा तु दुःखार्तः सुमंत्रेण चिरं सह । गंगपारे गते रामे जगाम स्वपुरं गुहः ॥१॥**

**भरद्वाजाभिगमनं प्रयागे च सभाजनम् । अग्गिरेर्गमनं तेषां तत्रस्थैरभिलक्षितम् ॥२॥**

**अनुज्ञातःसुमंत्रोथ योजयित्वा हयोत्तमान् । अयोध्यामेव नगरीं प्रययौ गाढदुर्मनाः ॥३॥**

पुसोनि सुमंता गुहकासी । श्रीराम बैसोनि नावेसीं[६] । गेलिया गंगापरतीरासी । लागली दोघांसी टकमक ॥२॥ न लागतां पातया पातीं । दोघे श्रीरामासी पाहती । दृष्टी अंतरल्या रघुपती । दोघे पडती मूर्च्छित ॥३॥ जरी दोघे जाले सावधान । तरी रामविरहें अति दुर्मन[७] । अश्रुधारा वाहती नयन । करिती स्मरण रामनामें ॥४॥ वाचे रामनामस्मरण । रामरूपी जडले

---

शब्दार्थ - १. नगरापेक्षा, २. या नावाचा बटवृक्ष, ३. मस्तकाने, ४. हत्तींनी मोडलेले वृक्ष, ५. निश्चयाची, निर्धाराची, ६. नावेमध्ये, ७. उद्विग्न.

नयन । हृदयीं धरलिया रघुनंदन । दुर्मन तें सुमन होय श्रीरामें ॥५॥ गुहक म्हणे सुमंतासी । राम भेटल्या एक निशी[१] । आम्हांसी अवस्था जालि ऐसी । मग अयोध्येसी काय होय ॥६॥

दूतांतर्फे श्रीरामाच्या निवासाची माहिती : गुहकें धाडिलें दूतासी । श्रीराम कोणे वनवस्तीसी । स्थिर होईल वनप्रदेशीं । त्या वार्तेसी आणावया ॥७॥ गुहकें आपुलिया ग्रामासी । आदरें आणिलें सुमंतासी । दूत आणितील वार्तेसी । तोंवरी त्यासी राहविलें ॥८॥ दूत सांगती गुहकासी । श्रीराम जावोनि प्रयागासी । भेटी देवोनि भारद्वाजासी । स्थिरनिवासी[२] चित्रकूटीं ॥९॥ सुमंतें ऐकोनि वार्ता । वेगी संजोगोनी[३] रथा । गुहका पुसोनि तत्वतां । होय निघता अयोध्येसी ॥१०॥

सुमंत्रमभिधावंतः शतशोऽथ सहस्रशः । क्व राम इति पृच्छतः सूतमभ्यद्रवन्नराः ॥४॥

सुमंताचे अयोध्येत परत येणे, तेथील विलाप : सुमंत आला देखोन । धाविंनले नागरिक जन । सांग रामा कोणे स्थळीं सोडून । तुझें आगमन सुमंता ॥११॥ सुमंत एकासी सांगे गोष्टी । तंव आले शतसहस्त्र लक्षकोटी । रिता रथ देखोनि दृष्टीं । पडिले सृष्टीं मूर्च्छित ॥१२॥ नरनारी आक्रंदत । सुमंत नव्हे हा कुमंत । वनीं सांडोनि रघुनाथ । आला येथें काळतोंडा ॥१३॥ सुमंत आलियावरी । आकांत मांडिला नगरीं । चरफडित नरनारी । घरोघरीं आरडती ॥१४॥ जळो याचें काळें मुख । आला नगरा द्यावया दुःख । निंदिती सकळ लोक सन्मुख । अधोमुख सुमंत ॥१५॥ राजपत्न्या शतें सात । रिता देखोनियां रथ । त्याही सुमंतातें निंदित । सोडोनि रघुनाथ हां कां आला ॥१६॥ रामापासून उफराटा । मी कां आलों करंटा । दुखें पिटित ललाटा । धिक् धिक् अदृष्टा[४] निर्लज्जा ॥१७॥ श्रीराम सांडिलियापाठीं । निंद्य होइजे सकळ सृष्टीं । रामरूपीं चळल्या[५] दृष्टी । पापें कोटी पदोपदीं ॥१८॥

सुमंताला पाहून राजा बेशुद्ध : निजनिंद्यत्वें स्वयें निंदित । तेणेंचि दुःखे अति दुःखित । महाद्वारीं सोडून रथ । आला सुमंत राजभवना ॥१९॥ पुत्रदुःखे दुःखी पूर्ण । गेली कळा हीनदीन । कृष्णवर्ण दिसे विवर्ण[६]। अति उद्विग्न नृपनाथ ॥२०॥ एकला देखोनि सुमंत । म्हणे नयेचि कां रघुनाथ । ऐसें बोलोनियां दशरथ । पडे मूर्च्छित धरणीये ॥२१॥

सुमंताकडून राजाला निवेदन : मग सुमंतें आश्वासोन । राजा केला सावधान । आला सुमंत देखोन । काय आपण बोलत ॥२२॥

राजा तु रजसा सूतं ध्वस्तांगं समुपस्थितम् । अश्रुपूर्णमुखं दीनमुवाच परमार्तवत् ॥५॥
क्व नु वत्स्यति धर्मात्मा वृक्षमूलमुपाश्रितः । किमुवाच वचा रामः किमुवाच च लक्ष्मणः ॥६॥
सुमंत्र वनमासाद्य किमुवाच च मैथिली । आसितं शयितं भुक्तं सूत रामस्य कीर्तय ॥७॥

राजा म्हणे सुमंतासी । कोणे ठायीं कोणे वस्तीसीं । राम काय बोलुनी तुजपासीं । तुज मजपासीं पाठविलें ॥२३॥ काय बोलली सती सीता । श्रीरामाची अति पढियंता । लक्ष्मण काय जाला बोलता । ते समूळ कथा मज सांगें ॥२४॥ सांडोनि राजभोग निजकांता । सांडोनियां मातापिता । वनीं सेवूं गेला रघुनाथा । त्या लक्ष्मणापरता धन्य नाहीं ॥२५॥ धन्य ते सती सीता । धन्य तो लक्ष्मण भ्राता । धन्य जन्म श्रीरघुनाथा । पितृवचनार्था प्रतिपाळी ॥२६॥ त्यांसी कोठे मिळाले अन्न । तिहीं कोठें केलें भोजन । अश्रुधारा गळती नयन ।

---

शब्दार्थ - १. रात्र, २. स्थिर राहण्यास, ३. जोडून, ४. पाहून त्याची दृष्ट लागेल असा, ५. नजर दुसरीकडे जाणे, ६. अजून काळा.

मूर्च्छापन्न पुनः पुनः ॥२७॥ तिहीं कोठें केले शयन । काय आस्तरण[1] प्रावरण[2] । कोणें केले चरणसंवाहन[3] । प्रातर्बोधन[4] कोणीं केले ॥२८॥ त्यांची समूळ सांगे वार्ता । मी काय करूं रे सुमंता । धीर न धरवे माझ्या चित्ता । श्रीरघुनाथावांचोनी ॥२९॥ श्रीराम सीता चालती चरणीं । हे म्यां विरुद्ध केली करणी । म्हणोनि गडबडां लोळें धरणीं । कैकेयीवैरिणीं वैर केलें ॥३०॥ जंव जंव आठवी रघुनाथा । तंव तंव उभड[5] न धरवे चित्ता । धीर न धरवे सर्वथा । हृदयस्फोटता होऊं पाहे ॥३१॥ त्यांचे वनवासाची वार्ता । वेगीं सांग रे सुमंता । काही सुख होईल चित्ता । श्रीरामकथा परिसोनी ॥३२॥

उत्तीर्णायां तु गंगायामहमामंत्र्य राघवम् । अनुज्ञातो निवृत्तोऽस्मि धार्मिकेण महात्मना ॥८॥

सुमंत सांगे रायासी । श्रीराम उतरतां गंगेसीं । रथ पाठविला तुम्हांपासीं । आपण वनवासी पदाभिगमन[6] ॥३३॥ माझा पिता अति वृद्ध जाण । माझे वियोगें दुःखे अति निमग्न । सुमंता त्यासी द्यावें आश्वासन । शीघ्र आगमन नेमांती ॥३४॥ चवदा वर्षे वनवासांती । मी येईन शीघ्र गतीं । ऐसें सांगविलें तुम्हांप्रती । मजहातीं श्रीरामें ॥३५॥

वनवासांत निराहार राहून तीन रात्र जलपान : त्यांचे वनवासलक्षण । तृपर्णांचें आस्तरण । वल्कलांचे प्रावरण । प्रातर्बोधन पक्ष्यांचें ॥३६॥ तिहीं नाहीं केलें भोजन । नाहीं केलें फळभक्षण । त्रिरात्रीं तिघें जण । केलें जळपान दिनांती ॥३७॥

दशरथाचा प्राणान्त करणारा विलाप : ऐसी ऐकतांचि गोष्टी । राय मूर्च्छित पडिला सृष्टीं । दुःखें होत हृदयस्फोटी । ललाट पिटी आक्रोशें ॥३८॥ गळीं अडकला जेंवी मांसा । तो जीवें न मरे चरफडी जैसा । दशरथाची तैसी दशा । मोहफांसीं विलपत ॥३९॥ सुमंता माझा पूर्वोपकार । तुज झाला असेल साचार[7] । तरी रथीं घालोनि रघुवीर । आणीं सत्वर मजपासीं ॥४०॥ श्रीराम भाक न सांडी सर्वथा । तो परतोनि न ये मागुता । मजचि वाहोनियां रथा । नेईं तत्वतां वनवासा ॥४१॥ काय करूं मी सुमंता । श्रीरामासी न देखतां । जीव जाईल तत्वतां । मज अति अवस्था[8] होतसे ॥४२॥ श्रीरामासवें गेली गती । श्रीरामासवें गेली चित्तवृत्ती । श्रीरामासवें गेली मती । प्राण रामाप्रती जाऊं पाहे ॥४३॥ रामरूपीं जडेल नयन । रामरूपीं जडले मन । रामापासीं जातील प्राण । सत्य जाण सुमंता ॥४४॥

दशरथाचे 'राम राम' म्हणतच दुःखद निधन : श्रीरामाचें रूप गुण । आठवितां मूर्च्छा आली पूर्ण । मूर्च्छेसवें गेला प्राण । रामस्मरण करीतचि ॥४५॥ राम राम करितां स्मरण । स्वयें दशरथें सांडिला प्राण । मन बुद्धि इंद्रियें जाण । रामार्पण तेणें केलीं ॥४६॥ आवडी श्रीरामीं धरोनि पोटीं । राम राम जपतां वाक्पुटीं[9] । देह त्यजोनि रामसृष्टीं । रिघे वैकुंठी दशरथ ॥४७॥ सप्रेम आवडीं धरिला राम । दृष्टीं न सोडी श्रीरामप्रेम । वाचें स्मरतां श्रीरामनाम । मरणधर्म दशरथा ॥४८॥ मनीं राम ध्यानीं राम । नयनीं राम वदनीं राम । ऐसा स्मरतां राम राम । प्राणोत्क्रमण रायासी ॥४९॥ करितां श्रीरामाचें स्मरण । विस्मरणासी आलें स्मरण । तंव श्रीरामीं जडला प्राण । देहनिर्वाण दशरथा ॥५०॥ श्रीरामाच्या अति प्रीतीं । देह त्यागिला भूपतीं । कौसल्या सुमित्रा जंव पाहती । तंव मरणप्राप्ती दशरथा ॥५१॥ जेंवी आरसा पालथा करितां । प्रतिरूप[10] न दिसे पाहतां । तेंवी श्रीराम वना जातां । राया दशरथा निजमृत्यु ॥५२॥ निःशेष पाझरलिया घटजळ । जेवीं घटचंद्र[11] लोपे तत्काळ । न देखतां श्रीराममुख-कमळ । मरे तत्काळ दशरथ ॥५३॥ सूर्य पावतां अस्तमाना । जेंवी अंधकार कोंदे गगना ।

---

शब्दार्थ - १. आंथरुण, २. पांघरूण, ३. पाय रगडणे, ४. पहाटे जागे करणे, ५. गहिवर, ६. पायी चालणे, ७. खरोखर, ८. अति चिंता, ९. वाचेने, १०. प्रतिबिंब, ११. घागरीतील पाण्यात पडलेले चंद्राचे प्रतिबिंब.

तेंवी अंतरतां रघुनंदना । पावला मरणा दशरथ ॥५४॥

**कौसल्येचा विलाप :** रामविरहें उठाउठीं । दशरथें सांडिली सृष्टी । राणिवसां[1] बोंब उठी । कपाळ पिटी कौसल्या ॥५५॥ राम धाडिला वनसंकटीं । राय निघाला वैकुंठीं । कैकेयी पावली सुखसंतुष्टी । राज्यपटीं ते बैसो ॥५६॥ वना दवडिला श्रीरघुनाथ । निःशेष निमाला दशरथ । कैकेयीचा मनोरथ । सुखस्वार्थ पावला ॥५७॥

**कैकेयीचा धिक्कार :** राज्यलोभें परम दुःख । त्याचा कैकेयीस हरिख । क्षुरें[2] अभिषेका समस्तक । राज्यसुख भोगावया ॥५८॥ पतिअंतकाळीं काळें वक्त्र । त्यावरी मस्तकीं धरा छत्र । शीस[3] बोडोनि साचार । युग्मचामरें ढाळावीं ॥५९॥ पतीस आगीं घालोनि आधीं । कैकेयी बैसवावी गजस्कंधीं । हाका बोंबांचिये पैं नादीं । राज्यपदीं अभिषेका ॥६०॥ पुत्र भोंवंडूनी दोन्ही । कैकेयी बैसवावी सिंहासनीं । रायासी पिंडदान देऊनी । राजभवनीं कैकेयी ॥६१॥ रायासी करोनि घटस्फोट । कैकेयीस विस्तारावें ताट । बत्तिसा वाटियांचे उद्भट । चोखट षड्रसीं ॥६२॥ रायासी देतां तिळोदक । गोत्रकुटुंबासी दुःख । तंव तंव कैकेयीस हरिख । राज्यसुख भोगावया ॥६३॥ असो हें कैकेयीचें कथन । वना गेला रघुनंदन । राजा पावलासे निधन । सहगमन करीन मी ॥६४॥ कैकेयी राहील राज्यभोगासी । मी जाईन पतीसरसीं । क्षणार्ध राहतां वैधव्यासीं । पापरासी पदोपदीं ॥६५॥ पति जळतां धडधडां । आगीं न रिघती रांडवा मूढा । तोडावी गळसरी फोडावा चुडा । सुखभोग पुढां तो ऐका ॥६६॥ काजळ कुंकूं नाहीं चंदन । दावूं नये काळें वदन । मासमासासी मुंडण । अति दंडण लाजेचें ॥६७॥ विधवा शोभनीं[4] अशोभन । जीतप्रेत ते विधवा प्राण । विधवा मुख्य अपशकुन । सुख कोण जिण्याचें ॥६८॥ केवळ देहलोभासाठीं । जे जे बैसे रांड पटीं । स्वप्नीं सुखासी नाहीं भेटी । दुःखकोटी अनिवार ॥६९॥ वैधव्याचें महादुःख । सोसूं शके कैकेयी एक । भोगावया राज्यसुख । अति कौतुक वैधव्या ॥७०॥

**कौसल्या सहगमनार्थ सिद्ध, राण्यांचा शोक :** वैधव्यांचें दुःख दारुण । तें मी न साहे अर्धक्षण । करितां राजदेहदहन । सहगमन करीन मी ॥७१॥ देखोनि कौसल्येचे रुदन । राजपत्न्या घेती वदन । दुःखें तोडिती केश कान । मूर्च्छापन्न पैं एकी ॥७२॥ एकी कपाळ स्वयें घेती । एकी वक्षःस्थळ पिटिती । एकी अति दुःखे पडती । एकी रडती अति शोकें ॥७३॥ एक दुःखवियोग रघुनाथा । दुसरें मरण राया दशरथा । तिसरें वैधव्य आले माथां । मूळ अनर्था कैकेयी ॥७४॥ भोगावया राज्यपटा । कैकेयीची वरदनिष्ठा । तिघां केलीया ती वाटा । या मुख्य चेष्टा मंथरेच्या ॥७५॥ श्रीरामासी वनप्रयाण । दशरथासी त्वरित मरण । यासी मंथरा मुख्य कारण । तिचें कान नाक छेदावें ॥७६॥ राजपत्न्या अति प्रवळ । दुःखे करिती हलकल्लोल । आले नागरिक सकळ । अति कोलाहल नगरांत ॥७७॥ आक्रंदोनि नरनारी । शोक करिती घरोघरीं । बोंब पडली राजद्वारीं । सेनानी मंत्री चरफडती ॥७८॥

**नागरिकांकडून कैकेयीचा धिक्कार :** श्रीराम घालितां बाहेरी । अवदसा आली नगराभीतरीं । राजा निमाला दुखेंकरीं । घरोघरीं आकांत ॥७९॥ कैकेयीचें काळें तोंड । तिणें वाढविलें वरदबंड । तीस मंथरा मिळोनि लंड । दुःख वितंड वाढविलें ॥८०॥ जिचेनि निमाला निजकांत । ते कैकेयीचा करावा घात । मंथरा घालोनि चुनखडियांत । राज्यीं रघुनाथ अभिषेकाचा ॥८१॥ वेगीं लक्ष्मण आणा येथ । तो साधील सर्वकार्यार्थ । ऐसें बोलती जन

शब्दार्थ - १. जनानखान्यात, २. वस्तऱ्याने, ३. डोके, ४. वाढवे.

समस्त । तळमळीत अति दु:खें ॥८२॥ निर्लज्ज कैकेयीचा वृत्तांत । ना राम ना दशरथ । शेखीं ईसी त्यजील भरत । वृथा अनर्थ इणें केला ॥८३॥ भरत स्वधर्मशीळ सात्विक । सप्रेम श्रीरामाचा सेवक । तो न पाहे इचें काळें मुख । त्यासही दु:ख इयें दिधलें ॥८४॥ कैकेयीनें केलें जें चरित्र । भरत मानील अपवित्र । पति निमाला त्यजील पुत्र । सखे सावत्र दु:खी केले ॥८५॥ श्रीराम गेला वनांतरीं । हे वार्ता ऐकिल्यावरी । भरत न राहेल क्षणभरी । तोही रानभरी इयें केला ॥८६॥ जळो तिचें काळे मुख । निजपति मारिला नि:शेख । पुत्र दुराविले निर्दोष । जगासी दु:ख इचेनि ॥८७॥ कैकेयी पाहे ज्यां समोर । ते म्हणती झांकीं मुख अपवित्र । सन्मुख थुंकती सर्वत्र । करिती मरमर नरनारी ॥८८॥ अवो रांडें अवो मूढे । अवो कैकेयी काळतोंडे । म्हणोनि तिचे नांवें फोडिती धोंडे । अति उदंड निंदिती ॥८९॥ कैकेयी पावली परम दु:ख । जगीं दाखवूं न शके मुख । दिवाभीताऐसीं[1] देख । लपे नि:शंक अंधारीं ॥९०॥ राजगृहीं कोलाहल । नरनारी दु:खी प्रबळ । तेथे पावले सुहृद सकळ । आले तत्काळ ऋषिवर्य ॥९१॥

मार्कंडेयोऽथ मौद्गल्यो वामदेवश्च कश्यप: । कात्यायनस्तु जाबालिर्गौतमश्च महायशा: ॥१॥

राजाच्या निधनानंतर अनेक ऋषींचे आगमन : दशरथें थोर थोर । नगरीं राहविलें ऋषीश्वर । ते समस्त आले सत्वर । अति पवित्र ते ऐका ॥९२॥ मार्कंडेय मौद्गल्या उत्तम । कात्यायन जाबालि गौतम । कश्यप वामदेव परम । पवित्र नामें जयांची ॥९३॥ ते समस्तही ऋषी । वेगीं आले राजसभेसी । प्रधान आले तयांपाशी । राजदेहासी दहनार्थ ॥९४॥ एक म्हणती करावें दहन । एक म्हणती पुत्रेंवीण । कोण देईल दाहो जीवन । अधिकार पूर्ण पुत्रासी ॥९५॥

प्रधानादिकांचे आगमन, दहनविधीची चर्चा : रायाचे जे प्रधान । ते राजपुत्रासमान । नि:संतानियाचें दहन । अयोग्य प्रधान सपुत्रिका ॥९६॥ सिद्ध असतां धर्मपत्नी । तीस योग्यता पतिदहनीं । हा अधिकार वंध्येलागोनी । नाहीं पुत्रजननीस पैं योग्य ॥९७॥ ऋषी बोलती सज्ञान । येथे वसिष्ठाचें प्राधान्य । तो कांहीं न बोले वचन । राजदहनसंस्कारा[2] ॥९८॥ बुद्धिंवत बोलती गाढे । कैकेयीपुत्र येईल पुढें । तंव राजदेहा पडती किडे । दहन रोकडे करावे ॥९९॥ ऐसे ऋषींचे अनुवाद[3] । करिती संवादविवाद । वसिष्ठमर्यादा अगाध । कार्यावबोध तो जाणे ॥१००॥ जाणे कर्मधर्मज्ञान । जाणे वेदशास्त्रविधान । जाणे ब्रह्मसमाधान । त्यासमान आन नाहीं ॥१॥ जयाच्या वचनासाठीं । सूर्यमंडळीं तपे छाटी । त्याचे ज्ञानाची अगाध गोष्टी । दुजा सृष्टीं असेना ॥२॥

वसिष्ठांनी तेलाने भरलेल्या नौकेत राजाचा देह ठेवला : तेणें वसिष्ठें येवोनि आपण । । तैलद्रोणींत राजा घालोन । जेणे देह निर्विकार जाण । केलें रक्षण अति यत्नें ॥३॥ शीघ्र भरताचें आगमन । यदर्थीं सुमंत अति सज्ञान । वसिष्ठें देवोनि सन्मान । त्वरें प्रयाण करवित ॥४॥

भरताला आणण्यास सुमंताला पाठवले : सुमंता तुंवा येचि काळीं । तूं आप्त एक रायाजवळी । भरत आणावा तत्काळीं । मायामातुळीं जो आहे ॥५॥ शीघ्र बैसोनियां रथासीं । जावें गिरिव्रज नगरासी । भेटोनि कैकय भूपतीसी । भरत रातोरातीं आणावा ॥६॥ करोनि वसिष्ठासी नमन । सुमंतें शीघ्र केले गमन । मार्गी आठवितां श्रीरामाचे गुण । करी रुदन पुन: पुन: ॥७॥ श्रीरामाचे रूप गुण । आठवितां विरह पूर्ण । एकाजनार्दना शरण । पुढील निरूपण अवधारा ॥८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां दशरथप्राणोत्क्रमणं नाम दशमोऽध्याय: ॥ ओव्या ॥१०८॥ श्लोक ॥१॥ एवं ॥११७॥

---

शब्दार्थ - १. घुबडासारखी, २. राजाच्या अंत्यविधीबद्दल, ३. बोलणी.

# अध्याय अकरावा

## श्रीरामपादुकांना पट्टाभिषेक

श्रीरामांची त्यागबुद्धी पाहून सुमंताची अवस्था : श्रीरामचंद्राय नमः ।। श्रीरामाचें वनप्रयाण । ते काळींचें निर्लोभपण । सुमंत आठवी आपण । श्रीरामीं मन दृढ जडलें ।।१।। त्या त्यागाची निजगती । दावोनी गेला श्रीरघुपती । ते सुमंत स्मरे अति प्रीतीं । त्यागस्थिती ते ऐसी ।।२।। असत्य त्यजिजे जेंवी पवित्रें । तेंवी त्यागी राज्यालंकार वस्त्रें । वना निघतां श्रीरामचंद्रें । केलें वल्कलांबर परिधान ।।३।। जेवीं निंदा त्यजिजे साधुसंतीं । तेंवी राज्यवैभवसंपत्ती । सर्वही त्यजोनि रघुपती । निघे वनाप्रती वल्कलांबरीं ।।४।। रजकस्पर्शाचें[1] जीवन । जेंवी नातळती साधुजन । तेंवी सांडोनि राज्यादि धनमान । निघे रघुनंदन वनवासा ।।५।। राज्यातील अणुप्रमाण । श्रीराम कांहींच नेघे जाण । त्यजोनियां पादत्राण[2] । निघाला आपण वनवासा ।।६।। देखोनि श्रीरामनिर्याण[3] । त्यापूर्वीच सीता लक्ष्मण । करोनि वल्कलें परिधान । वनाभिगमनीं उल्हासी ।।७।। जंव जंव तपे सूर्य तीव्रता[4] । तंव तंव कमळीं शोभा अधिकता । तेंवी एकाकी राम वना जातां । लक्ष्मण सीता उल्हासी ।।८।।

लक्ष्मण व सीतेला श्रीरामसेवेचे भाग्य लाभले ते आपणास न लाभल्यामुळे सुमंताला विषाद : देखोनि पूर्णिमापूर्णचंद्र । चकोरां आल्हाद अपार । तेंवी वना रिघतां श्रीरामचंद्र । सीता सौमित्र उल्हासी ।।९।। एकाकी राम वना जातां । सफळ सेवा आमची आतां । येणें भावार्थें लक्ष्मण सीता । उल्हासता वना गेलीं ।।१०।। जेंचि रघुनाथाचें गमन । दशरथाचें प्राणोत्क्रमण । स्थळींचें आटतां जीवन । प्रतिबिंब पूर्ण हारपे ।।११।। पुढोनि नेतांचि दर्पण[5] । स्वयें हारपे प्रतिवदन[6] । तेंवी वना जातां रघुनंदन । दशरथें प्राण सोडिला ।।१२।। निःशेष आटतां जळ । मीन मरे न लागतां पळ । तैसा राम वना जातां केवळ । दशरथें तत्काळ प्राण सांडिला ।।१३।। श्रीराम जगाचें जीवन । तोचि दशरथा मृत्युकारण । राम राम म्हणतां जाण । रायें निजप्राण सांडिला ।।१४।। राम प्रवेशतां वनस्थळीं । भरत शत्रुघ्न मायामातुळीं । तेही जरी असते जवळी । जाते तत्काळीं वनवासा ।।१५।। मीच अभाग्यें अभाग्य पूर्ण । श्रीरामनिजसेवा सांडून । कां अयोध्ये आलों परतोन । म्हणोन रुदन करी मार्गीं ।।१६।। श्रीरामसेवा होय प्राप्त । त्याचें भाग्य अति समर्थ । मी अभागीं घेवोनि आलों रथ । म्हणोनि रडत मार्ग क्रमी ।।१७।।

मातुलगृही भरताला दुस्वप्न : पुढील कथानुसंधान । मातुळीं भरत शत्रुघ्न । भरतासी जालें दुष्ट स्वप्न । तेहीं कथन अवधारा ।।१८।। भरतें मातुळीं देखिलें स्वप्न । अशिरीं[7] तैलाभ्यंजन । भरत स्वप्नलक्षणाचें जाणे चिन्ह । आक्रंदें रुदन मांडिलें ।।१९।। गजबजोन आला मातुळ । पुसे व्यर्थ रुदना काय मूळ[8] । येरु म्हणे अति प्रबळ । दुःखमूळ आम्हां झालें ।।२०।। जें म्यां देखिलें आजि स्वप्न । त्याचें आहे ऐसें लक्षण । आम्हां पांचांमाजि एक जण । निश्चयें मरण पावेल ।।२१।। माझें स्वप्न नव्हे व्यर्थ । राजा अथवा रघुनाथ । लक्ष्मण शत्रुघ्न कां मी भरत । एकाचा जीवघात होईल ।।२२।। आणि निजसज्जनांची भेटी । बहुकाळ होईल तुटी । बोलतां बाष्प

---

शब्दार्थ – १. धोब्याच्या विटाळाचे, २. वहाणा, चपला, ३. रामाचे गमन, ४. तीव्रतेने, ५. आरसा, ६. मुखाचे प्रतिबिंब, ७. डोकें नसलेल्याला, ८. कारण.

दाटे कंठीं । पडिला सृष्टीं मूर्च्छित ।।२३।। कैसेनि राम देखेन दृष्टीं । आक्रंदें हांक दिधली मोठी। केंवी दशरथेंसीं होईल भेटी । म्हणोनि पिटी ललाट आक्रंदोन ।।२४।। मातुळ म्हणे सुमुहूर्त । पाहोनि तुज पाठवूं तेथ । येरु म्हणे मृत्यू आला निश्चित । सुमुहूर्त कुमुहूर्त कवणातें ।।२५।।

वसिष्ठांनी केलेली योजना : तंव अयोध्येसी श्रीवसिष्ठ । कुळगुरु अति वरिष्ठ । अर्थ परमार्थ जाणे श्रेष्ठ । विचार चोखट[1] तेणें केला ।।२६।। भरतासी राज्याभिषिंचन । न करितां नव्हे राजदहन । यालागीं भरताचें आगमन। अति त्वरेनें पाहतसे ।।२७।। न सांगावें राजमरण। विशेषें श्रीरामाचें गमन । अवचटें ऐकतांचि जाण । तत्काळ प्राण सांडील।।२८।। उत्तम वस्त्रें अलंकारांसी । देवोनि सुमंत प्रधानासी । त्वरेंनें भेटावें भरतासी । अति शीघ्रतेसीं आणावें ।।२९।।

सुमंताचे भरताकडे आगमन : भरतासी रसिक वचनीं । मातुळ करी संबोखणी[2] । तंव सुमंत पावला तेच क्षणीं । अयोध्यापाटणीं कुशल सर्वां ।।३०।। भरते पाहिलें सुमंताकडे । तुझी शोभा कां क्षीण पडे । हृदयीं दुःख दाटलें गाढें । तें मुखापुढें दिसतसे ।।३१।। अश्रुपूर्ण तुझे नयन । मार्गीं आलासी करीत रुदन । वार्ता सांगसी लज्जायमान । हीन दीन मुख तुझें ।।३२।। चांचरी अंगुष्ठ धरूनि मस्तकावरी । तुज सुख नाहीं तिळभरी । बुडालासी दुःखसागरीं । चांचरी वैखरी[3] दुःखाभिभूत ।।३३।।

सुमंताबरोबर भरतशत्रुघ्नांचे अयाध्येकडे प्रयाण : असो तुझ्या दुःखाची कथा । मजचि जाणें आहे आता । विलंब करूं नये सर्वथा । शत्रुघ्नेंसीं रथारूढ जाला ।।३४।। रथ प्रेरिला त्वरेसीं । ठाकोनि आले अयोध्येसी । अयोध्या पाहतां चौपासीं । दुःख भरतासी आसंडलें ।।३५।। जेथें श्रियेसीं श्रीरामनिवास । जेथें दशरथ वसे क्षितीश[4] । ते अयोध्या दिसे उद्वस । जैसें कां ओस शकुंतनीड[5] ।।३६।।

अयोध्येचे बदललेले स्वरूप : पहातां अयोध्येची शोभा । आरक्त धुई[6] दाटली नभा । रोहिणी मृग भेदोनि वृषभा । ग्रहचक्रीं उभा शनि भौम वक्र ।।३७।। अयोध्यामंडळीं असाधारण । क्रूर भासती ग्रहगण । तेणें अयोध्येचें लक्षण । अति विलक्षण दुर्भगत्वें ।।३८।। तंव राजद्वारी छत्रभंग । मृत्युप्राय लोकलिंग[7] । राजभवनीं अति उद्वेग[8] । सौभाग्यभंग राजपत्न्यां ।।३९।। पुढें पाहे राजभवनीं । राजा देखिला तैलद्रोणीं । थोर गजबजला मनीं । अश्रु नयनीं लोटले ।।४०।। म्हणोनि धांवला उठाउठीं । तंव राजा गेला सांडोनि सृष्टी । आतां श्रीरामीं घालीन मिठी । तोही दृष्टी दिसेना ।।४१।।

सुमंताकडून वृत्तांतकथन, भरताचा विलाप : मंत्री गुह्य सांगे कानीं । कैकेयीयें राम दवडिला वनीं । हे मुख्यत्वें मंथरेची करणी । सीता चरणीं धाडिला वना ।।४२।। मग आक्रंदें दिधली हाक । श्रीरामा दाखवीं रे निजमुख । माझे सुखाचें तूं निजसुख । मज वंचोनि देख गेलासी ।।४३।। म्यां सांडोनियां तुझी संगती । गेलों मायामातुळाप्रती । हे देखोनि माझी अभक्ती । मज तुवां निश्चितीं त्यागिलें ।।४४।। सांडोनि तुझा निजसंग। मायामातुळीं भोगितां भोग । तेणें तुजसीं जाला वियोग । मी परम अभाग्य श्रीरामा ।।४५।। जितुकी विषयांची आसक्ती । तितुकीं विघ्नें श्रीरामप्राप्ती । विषय तेचि भवबंधनप्राप्ती । नरकगती निजविषयें ।।४६।। विष विषय समानस्थिती । परंतु विषया अधिक शक्ती । विष भक्षिल्या एकदां मरती । जन्ममरणपंक्तीं विषयेंची ।।४७।। विषयांचे जे विषयभोग । तोचि इंद्रादिकां पदभंग[9] । विषय तोचि मुख्य क्षयरोग । नित्य आघात तो विषय ।।४८।। असो इतरांची इतर गती । मीच

शब्दार्थ – १. चांगला, २. सांत्वन, ३. वाणी, ४. पृथ्वीपालक, ५. पक्ष्याचे, घरटे, ६. धुके, ७. लोकांचे चिन्ह, ८. दुःख, शोक, ९. आपल्या स्थानापासून.

ठकलों विषयासक्तीं । राम अंतरला हातोहातीं । मायामातुळस्थितीं विषयत्वें ॥४९॥ मायामातुळविषयस्थिती । श्रीरामें त्यजिली निश्चितीं । जेथवरी विषयप्रीती । त्या रामप्राप्ती कदा न घडे ॥५०॥ जेथवरी मानाभिमान । जयासी ज्ञानगर्व[1] गहन । त्यासी न भेटती श्रीरामचरण । प्रत्यक्ष प्रमाण मज घडलें ॥५१॥ मज घडलें अति दूषण । अंगीं आदळलें लांछन । जळो माझें बंधुपण । श्रीरामचरण अंतरले ॥५२॥ जो मी होतो निजआत्मबंधु । तो मी जालों अति अबंधु । राम अंतरला कृपासिंधु । मी भाग्यमंद अति दुःखी ॥५३॥ कैकेयी अविद्येचा बाधु । बंधु तें केलें अबंधु । लाविला सापत्नसंबंधु । राम कृपासिंधु अंतरला ॥५४॥ अंतरला सुखावबोधु । अंतरला स्वानंदकंदु । अंतरला निजात्मबंधु । राम परमानंदु अंतरला ॥५५॥ दशरथें केलें परलोकप्रयाण । श्रीरामासवें दिधला प्राण । मी वाचलों असें पाषाण । अति कठिण उलडेना[2] ॥५६॥ वना जातां श्रीरामरावो। राजा गेला सांडूनि देहो । मी महापातकी उरलों पहाहो । देहमोहो छेदवेना ॥५७॥ दूरी जातां रघुनाथ । तत्काळ देह त्यागिला दशरथें । मी पापी उरलों भरत । अद्यापि मृत्यु मज नये ॥५८॥ दूरी जातां श्रीरामासी । दशरथें सांडिलें देहासी । मी उरलों पापराशी । द्वंद्वदुःखासी भोगावया ॥५९॥ अद्यापि मज नये मरण । तरी मृत्यु निमाला आपण । काळाचें जालें काळें वदन । माझें देहबंधन छेदवेना ॥६०॥ रामविरहें धडफुडा[3] । मृत्यु निमाला बापुडा । मी राहिलों काळाचा काकडा । दुःखाचा हुडा[4] अतिदुःखी ॥६१॥ श्रीराम वना जातां जाण । मृत्यूनें सांडिला आपुला प्राण । आतां मजला मारील कोण । मी पापी पूर्ण उरलोंसें ॥६२॥ जितां जीववेना रामाविण । काळ निमाला न ये मरण । माझें अति शयें दुःख दारुण । निवारी कोण रघुनाथा ॥६३॥

भरताचा रामवियोगामुळे आक्रोश : ऐसी बोलत बोलतां बोली । धरणीवरी अंग घाली । श्रीराम माझी निजमाउली । केउती[5] गेली चुकवोनी ॥६४॥ श्रीरामा मजला देईं भेटी । सांगेन जीवींच्या गुह्यगोष्टी । श्रीरामचरण न देखें दृष्टीं । म्हणोनि पिटी लल्लाट ॥६५॥ राम माझा निजात्मा । राम माझा जीवात्मा । राम माझा परमात्मा । तो कां आम्हा विसरला ॥६६॥ केउता गेलासी श्रीरामा । भेटी देइजे मेघश्यामा । धांव पाव पुरुषोत्तमा । माझ्या भवभ्रमा निवारीं ॥६७॥ श्रीरामा धांव पाव तांतडी[6] । वेगीं पावें लवडसवडी । मजलागीं घालोनि उडी । माझ्या दुःखकोडी निवारीं ॥६८॥ राघवा वेगें येरे येरे । मजलागीं तूं कडिये घेरे । मी तुझें लडिवाळ कीं रे । अतिदुःखभरें पीडिलों ॥६९॥ राम माझी गतीची गती । राम माझी स्थितीची स्थिती । राम माझी मुक्तीची मुक्ती । तो हातोहातीं अंतरला ॥७०॥ श्रीरामसंगति अति गोड । लक्ष्मण परिपाकें अति सुरवाड[7] । मी रामसंगतीवांचून मूढ । उरलों कांकडमुग[8] जैसा ॥७१॥ रघुनाथाचा निजसांगती । धन्य लक्ष्मण त्रिजगतीं । मी मायामातुळसंगतीं । दुःखावर्ती अति दुःखी ॥७२॥ लक्ष्मण बंधुत्वें अति सभाग्य । मी बंधुत्वें अति अभाग्य । सकळ दुःखीं व्यापिलें अंग । तरी अंगभंग नव्हे माझा ॥७३॥ तुंबिणीच्या[9] फळाची स्थिती । एका होती यंत्रीपात्र[10] हातीं । एका दुस्तरीं तारक होती । एकक प्राशिती रुधिरातें ॥७४॥ एक शुद्धसंगती । मधुरवचनीं देती विश्रांती । तैसी अशुचिही गती । संगप्राप्तिपरिपाक ॥७५॥ लक्ष्मण शुत्रसंगती । तारक विश्रांति त्रिजगतीं । मी मायामातुळस्थिती । दुःख प्राप्ती रुधिरप्राय ॥७६॥

---

शब्दार्थ - १. अज्ञानाचा, २. फुटत नाही, ३. खरा, ४. बुरूज, ५. कोठे, ६. लौकर, ७. फार सुखदायक, ८. मुगातला चहाड, ९. भोपळीच्या, १०. भीक मागण्यासाठी वापरण्याचें भांडे.

कैकेयीची निर्भर्सना : राम मज नित्य निववी । राम जीवाशिवांचा गोसावी[१] । राम सुखानंद जान्हवी । कैकेयीयें अवघी कोरडी केली ॥७७॥ राम मज निर्जी निजवी । राम जीवेंवीण जीववी । राम माझी स्वानंदपदवी । तें कैकेयीयें अवघी वंचिली भेदें ॥७८॥ राम माझें मुख्य मुदल । राम माझें नित्य भांडवल । राम माझें निजबळ । तें कैकेयीयें केवळ भेदें वंचिलें ॥७९॥ राम माझें निजजीवन । राम माझें निजअंजन । राम माझें निजनिधान । तें कैकेयीयें चोरोन नेलें भेदें ॥८०॥

मंथरेवर क्रोधदृष्टी : आम्ही सखे निजात्मबंधु । ते कैकेयीयें केला व्यर्थ भेदु । मुख्यत्वें सापत्नविरोधु । मंथरें सुबद्धु वाढविला ॥८१॥ भोळी कैकेयी बापुडी । मंथरें बुद्धी दिधली कुडी[२] । श्रीराम केला देशोधडी । अयोध्या रोकडी घातली दुःखी ॥८२॥ तिच्या करीन मी घातासी । म्हणोनि धाविन्नला वेगेंसीं । मंथरा धरोनि आणिली केशीं । क्रोधें हातवसी[३] खर्गातें[४] ॥८३॥ इचेनी वनवासी रघुनाथ। इचेनि निमाला दशरथ । इचेनि अयोध्येसी आकांत । जगा दुःखावर्त इचेनि ॥८४॥ सवतीमत्सराचें बंड । इणें वाढविलें प्रचंड । इचेनि कैकेयीचें काळें तोंड । इसी दुखंड करीन मी ॥८५॥ हे सूर्यवंशासी दुःखाची आगी । हे सख्यां सुहृदां योगभंगी । इचेनि कैकेयी निंद्य जगीं । ते मी वेगीं छेदीन ॥८६॥ इणें चरणचालीं दवडिली सीता । इचेनि अंतरला लक्ष्मण भ्राता । इणें दशरथ गिळिला पिता । ते मी आतां छेदीन ॥८७॥ इणें केलें थोर अनर्था । इचेनि वैधव्य मायेच्या माथां । माजही घातलें दुःखावर्ता । ते मी आतां छेदीन ॥८८॥ इचेनि आम्हां रामीं तुटी । इचेनि आम्ही पोरें पोरटीं । इचेनि आम्ही दीन सृष्टीं । ते मी उठाउठीं वधीन ॥८९॥

वसिष्ठ त्यापासून भरताला परावृत्त करतात, गो-ब्राह्मण-स्त्री अवध्य : तिचा करावया प्राणांत । भरत खर्गेसीं उद्यत[५] । वसिष्ठें धांवोनि धरिला हात । म्हणे स्त्रीघात करूं नये ॥९०॥ करूं नये स्त्रियेच्या घाता । उपेक्षूं नये निजमाता । मूर्ख म्हणों नये पिता । जरी तत्वतां अपंडित ॥९१॥ मानों नये द्विजाचा विटाळ । अतीत दवडूं नये भुकाळ । साधूस करूं नये छळ । नये करूं शस्त्रकल्लोळ स्त्रियेसी ॥९२॥ गो ब्राह्मण स्त्री बंधू । वधायोग्य केलिया अपराधू । तरी करूं नये यांचा वधू । तूं भरता प्रसिद्धु विवेकी ॥९३॥ गुरुवाक्य नुल्लंघावें सर्वथा । नावरेचि क्रोधावस्था । मंथरे हाणितल्या लाथा । अति निघाता निष्ठुरत्वें ॥९४॥ लाथेसरसी तळीं पडे । निघातें तिचा माज[६] मोडे । शरीर तीं ठायीं वांकडें । तेणें त्रिवक्रा पडे नाम तीस ॥९५॥ जिणोनियां राक्षसांसी । राम आलिया अयोध्येसीं । मंथरा लागेल पायांसी । मज दशा ऐशी श्रीरामस्वामी ॥९६॥ राम म्हणेल तुज उजू करितां । विषम वाटेल बंधु भरता । स्वभावें मज मथुरे जातां । तुझ्या मनोगता मी करीन ॥९७॥ ते राम जपे अहर्निशीं । तेणे सुवासिक आणिलें चंदनासी । कृष्णें चर्चोनियां निजांगासी । कुब्जा नीचदासी उद्धरिली ॥९८॥ हे बोलिलों प्रसंगता । मंथरा ते कुब्जा तत्वतां । पुढे काय वर्तलें भरता । तेही कथा अवधारा ॥९९॥

अभिषेक करून घेण्यास भरताचा वसिष्ठांना नकार : वसिष्ठ बोलिला वचन । न करितां राज्याभिषिंचन । करू नये राजदहन । राज्याभिषिंचन तुज करूं ॥१००॥ ऐसें ऐकतांचि वचन । भरतासी चालिलें रुदन । दुःखभरितें आलं दारुण । तत्काल प्राण त्यजूं पाहे ॥१॥ श्रीराम गेलियापाठीं । जरी मी बैसेन राज्यपटीं[७] । अवघ्या ब्रह्महत्या ज्या सृष्टी । त्या माझ्या लल्लाटीं निक्षेपोत[८] ॥२॥

---

शब्दार्थ - १. स्वामी, सत्ताधारक, २. खोटी, ३. हातात घेतले, ४. तरवार, ५. तयार, ६. कमर, ७. सिंहासनावर, ८. येऊन पडोत.

वना गेलिया रघुनाथा । पट्टाभिषिंचन[1] होय भरता । महादोषांच्या ज्या ज्या वार्ता । त्या त्या समस्ता म्यां केल्या ॥३॥ रामचंद्र गेलिया वना । जरी मी घेईन अभिषिंचना । तरी शूद्र भागी द्विजविधवांगना[2] । त्या गर्भस्थाना मी जाय ॥४॥ सकळ रजस्वलेचें रुधिर । तेणें अभिषेका माझें शरीर । परी राज्याभिषेकाचें नीर[3] । तें मी अणुमात्र स्पर्शेना ॥५॥ श्रीरामाची राजधानी । ते जाणा माझी जननी । ते जैं भोगिजे अभिषिंचनीं । तैं मातृगमनी मी जालों ॥६॥ वसिष्ठा स्पर्शतों तुझे चरण । वाहतों रघुनाथाची आण । राज्याचें अभिषिंचन । प्राणांतींही करूं नेदीं ॥७॥

शत्रुघ्नाची अवस्था : वसिष्ठ पाहे शत्रुघ्नाकडे । तंव तो बोलेना पैं रडे । श्रीरामविरहें झाले वेडे । मागें पुढे स्मरेना ॥८॥ विसरला तो घरदार । विसरला तो इंद्रियव्यापार । विसरला निजशरीर । तदाकार होवोनि ठेला ॥९॥ आठवितां श्रीरामचंद्रा । शत्रुघ्ना लागली योगमुद्रा । विसरला तो निद्रा तंद्रा । कृपा रामचंद्रस्वामीची ऐशी ॥११०॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन । कर्म क्रिया कर्तेपण । शत्रुघ्नासीं नाठवे जाण । आपणा आपण विसरला ॥११॥ करणें न करणें कांही । उठेना शत्रुघ्नाचे ठायीं । धैर्ये श्रीराम स्मरता पाहीं । देहीं विदेही तो जाला ॥१२॥ बोलिला भरत तो भावार्थ । त्याचा भाव दाविला यथार्थ । शत्रुघ्न तो धैर्य मूर्त । तो धैर्यवृत्तांत निरूपिला ॥१३॥ शत्रुघ्नाची ऐसी स्थिती । भरताची तैसी गती । आतां राज्याची कोण गती । वसिष्ठ चित्ती विचारी ॥१४॥

वसिष्ठांनी उपाय सुचविला : वसिष्ठ म्हणे भरतातें । व्यर्थ खेद कां करिसी येथें । जें मी सांगेन यथार्थे । तें त्वां निश्चितें करावें ॥१५॥ अभिषेकरामपादुकांसी । करूनि दहन[4] द्यावा रायासी । मग आम्ही रामापासीं । जाऊं वनासी भेटावया ॥१६॥ ऐकोनि वसिष्ठांचे वचन । भरता जालें अमृतपान । मग साष्टांगें करोनि नमन । मस्तकीं चरण वंदिलें ॥१७॥

कौसल्येचा सहगमनाचा विचार, श्रीरामभेटीचे कुलगुरूंचे वचन, त्यामुळे तिला मनःशांती : भरतें करितां राजदहन । कौसल्या करूं पाहे सहगमन । मग वसिष्ठें येवोनि आपण । निवारण तीस केलें ॥१८॥ सहगमन पतिसंकटीं । त्याहूनि अधिक श्रीरामभेटी । येरी म्हणे चवदा वर्षांपाठीं । जिण्याची गोष्टी दुर्लभ ॥१९॥ नगरा न येतां रघुनाथ । मध्येंचि मजला आलिया मृत्य । ना श्रीराम ना दशरथ । ऐसा अपघात मज होईल ॥१२०॥ ऐकोनि कौसल्येची गोष्टी । वसिष्ठ कळवळला पोटीं । रायाचें उत्तरकर्मापाठीं । करीन भेटी श्रीरामा ॥२१॥ कौसल्या म्हणे जी गुरुनाथा । अवश्य भेटवीन रघुनाथा । ऐसी मज भाक द्यावी आतां । तरी मी जीविता राखीन ॥२२॥ श्रीराम देखतांच दृष्टीं । मावळती द्वंद्वदुःखाच्या कोटी । आनंद न समाये सृष्टीं । सुखसंतुष्टीं श्रीरामें ॥२३॥ श्रीरामासी होय भेटी । तैं भाग्य दुर्लभ अति संकटीं । तें पाविजे सद्गुरुकृपादृष्टीं । तैं मी सृष्टीं अति धन्य ॥२४॥ कौसल्येचें सत्व चोख । देखोनि वसिष्ठासी पर सुख । उल्हासें देवोनिया भाक । राहविली निष्टंक[5] राममाता ॥२५॥

श्रीरामपादुकांवर अभिषिंचन, दशरथाची उत्तरक्रिया : भरते उठोनि आपण । रामपादुका अभिषिंचून । करोनि रायाचें दहन । और्ध्वदेहिक[6] पूर्ण तेणें केलें ॥२६॥ भरताचें अयोध्येसी गमन । तंव श्रीरामाचें दूरी गमन । एकाजनार्दना शरण । रसाळ निरूपण अवधारा ॥१२७॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामपादुकापट्टाभिषेको नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ ओंव्या ॥१२७॥

---

शब्दार्थ – १. राज्याभिषेक, २. ब्राह्मणाची विधवा स्त्री, ३. उदक, ४. अग्निसंस्कार, ५. निश्चयेकरून, ६. उत्तरक्रिया.

# अध्याय बारावा

## भरताचे वनप्रयाण व गुहकाशी संवाद

कैकेयी भरताला उपदेश करते : श्रीरामचंद्राय नमः ॥ जालिया जननिवृत्ती । पुन्हां प्राप्ती मध्यरात्रीं । कैकेयी येवोनि भरताप्रती । बोले उपपत्ती ते ऐका ॥१॥

उत्थापयित्वा कैकेयी पुत्रं वचनमब्रवीत् । उत्तिष्ठ पुत्र भद्रं ते राजपुत्र निबोध मे ॥१॥
त्वद्विधा नैव शोचंति सतां सदसि संमताः । गृहाणेदं स्वकं राज्यं सफलं कुरु मे श्रमम् ॥२॥
मनो नंदय मित्राणां मम चाभीष्टदर्शन । त्वत्कृते हि मया सर्वमिदमेवंविधं कृतम् ॥३॥
तत्पुत्र शीघ्रं विधिना विधिज्ञैर्वसिष्ठमुख्यैः सहितो द्विजेंद्रैः ।
संकाल्य राजानमदीनसत्व मात्मानमुर्व्यामभिषेचयस्व ॥४॥

उठवोनियां पुत्रासी । कैकेयी बुद्धि[१] सांगे त्यासी । राम गेला वनवासासी । तूं कां करिसी शोक त्याचा ॥२॥ रांडवे बायलेचे परी । रडतां न लाजसी सभेमाझारीं । ऊठ वेगीं धीर धरीं । अयोध्येचें करीं निजराज्य ॥३॥ मुख्य ज्येष्ठाचें निजराज्य । तें म्यां संकटें साधिलें तुज । शेखीं न मानिसी तूं मज । नाचसी भोजें[२] वना जावया ॥४॥ आयुष्य सरल्या निमाला पती । पितृआज्ञेने वनवास रघुपती । तो दोष ठेविसी मजप्रती । निजस्वार्थ नेणसी ॥५॥

सापत्नभावाचा वेदकालीन इतिहास : मुळीं लागोनि संसारी । सापत्न ते तव मुख्य वैरी । तें तुज सांगेन निर्धारीं । वेदशास्त्रसंमत ॥६॥ दिति अदिति दोघी सवती । एक पित्याची संतती । देवां देत्या वैरप्राप्ती । निजघाती येरयेरां ॥७॥ येचि अर्थी वेदोक्ती । बृहदारण्यप्रथमश्रुती । देव दैत्य वैरी होती । श्रुतिसंमती[३] अवधारा ॥८॥ सापत्नांमाजि अति प्रीती । कांहीच नाहीं वेदशास्त्रार्थी । गरुडसर्पां वैरप्राप्ती । ते काय नव्हेती निजबंधु ॥९॥

माझे ऐकून राजा हो, शत्रुघ्नाने युवराज व्हावे : ऐक माझी निजयुक्ती । तुवां न जावें वनाप्रती । आणोनि वसिष्ठादि ऋषिपंक्ती । घेई राज्यप्राप्ती अभिषेकें ॥१०॥ भरता तूं तंव सभाग्य पूर्ण । अभाग्य वनवासा गेला लक्ष्मण । तो जरी येथें असता जाण । करिता कंदन राज्यलोभें ॥११॥ मी सांगतें हित देखोन । तूं होई राजा संपूर्ण । युवराजा करीं शत्रुघ्न । माझें वचन प्रतिपाळीं ॥१२॥

त्यामुळे भरताचा संताप व उद्वेग, त्याने आईची निर्भत्सना करून तिला घराबाहेर घालविले : ऐकोनि मातेचें वचन । भरत कोपला संपूर्ण । कोपामाजी आले रुदन । अतिउद्विग्न[४] अनुतापी ॥१३॥ घायावरी हाणिजे लाता । तैसा पाड जाला भरता । म्हणे तूं तंव नव्हेसी माझी माता । पापरूपता संपूर्ण ॥१४॥ निजपति निमाल्याचें तुज । अणुमात्र दुःख ना लाज । राज्यभोगाचें सुखभोज[५] । अति निर्लज्ज नाचसी ॥१५॥ तुझ्या ऐकोनि वचनार्था । म्यां द्वेषावें श्रीरघुनाथा । स्वजना देवोनि दुःखवार्ता । नरकपाता[६] स्वयें जावें ॥१६॥ निजमातेचें हितोपदेशवाक्य । रौरवा[७] जावें आवश्यक । पूर्वजां न्यावें नरका देख । द्यावें दुःख जनासी ॥१७॥ निजपतीची घातकिणी । श्रीरामद्वेषाची संवदणी । सुहृदांसी दुःखकारिणी । जाय पापिणी अति निंद्य ॥१८॥ जळो तुझें काळे मुख । श्रीरामासी दिधलें दुःख । तुझें मजला नाहीं सुख । जगा असुख तुझेनि ॥१९॥ वधूं नये निजमाता । यालागी चुकलों तुझ्या घाता । तुझेनि मज दुःखावस्था । श्रीरामदशरथा विघडिलें ॥२०॥ तुज पाहतां सन्मुख । मज वाटे परम दुःख । नको दाखवूं काळें मुख । निंद्य निःशेष अति नष्टे ॥२१॥ भरत कोपोनियां भारी । निर्भर्त्सूनी नानापरी । कैकेयी घातली बाहेरी । तिचेनि[८] करीं[८] अतिदुःखी ॥२२॥ जिचेनि अंतरला

---

शब्दार्थ - १. मसलत, २. हर्षेकरून, ३. वेदांची मान्यता, ४. अत्यंत दुःखी, ५. सुखाची आवड, ६. नरकाला, ७. संवदणी=धोब्याचे वस्त्रे साफ करण्याचे पात्र, ८. तिच्यामुळे.

राघव । ते माता नव्हे महालाव[१] । जगीं इचें निंद्य नांव । दु:ख ओतींव कैकेयी ॥२३॥

श्रीरामभरतादि चारी बंधूंचे पिंडैक्य : श्रीराम भरतांचा पिंड एक । एका पिंडाचे दोघे देख । येरयेरांचें मानिती दु:ख । परम सुख येरयेरां ॥२४॥ येरयेरांचा जीवप्राण । येरयेरांचे जीवन । येरयेरां समाधान । सुखसंपन्न रामभरत ॥२५॥ भरतासी श्रीरामाचें सुख । श्रीरामीं भरताचा हरिख । एकमेकां दोघे एक । कैकेयी मूर्ख तें नेणें ॥२६॥ आठवितां श्रीरघुनाथ । परम सुखें सुखावे भरत । नाहीं राज्यलोभाचा स्वार्थ । परमामृत श्रीरामीं ॥२७॥ श्रीरामाच्या पायांपरतें । परम सुख नाहीं भरतातें । यालागीं त्यजोनि निजराज्यातें । श्रीरामातें भेटों निघे ॥२८॥ देवदैत्यां वैर वितंड । त्यांचा नव्हे एक पिंड । राज्यलोभें दु:ख उदंड । वैर अखंड येरयेरां ॥२९॥ भिन्नभिन्न पिंडोत्पत्ती । गरुडसर्पां वैरप्राप्ती । तैसें नाहीं श्रीरामभरतीं । चवघेही होती एकपिंड ॥३०॥ सौमित्र भरत आणि शत्रुघ्न । चवथा जाण रघुनंदन । चारी मूर्ति श्रीराम पूर्ण । व्यूह संपूर्ण या नांव ॥३१॥ चवघेही बंधु भिन्नभिन्न व्यक्ती । चारी मिळोनि श्रीराममूर्ती । व्यूहचतुष्टय यातें म्हणती । आगमार्थी वेदोक्त ॥३२॥ ऐसिया एकात्मता अति प्रीतीं । भेटों पाहे श्रीराममूर्ती । उदया येतांचि गभस्ती[२] । निजगमनार्थी उद्यत ॥३३॥

भरताचा श्रीरामांची भेट घेण्याचा निर्धार, वसिष्ठ भरताच्या मनाची कसोटी पाहातात : पाचारोनियां प्रधाना । म्हणे सिद्ध वेगीं करा सेना । भेटावया रघुनंदना । जाणें वना निश्चित ॥३४॥ वसिष्ठ येवोनि आपण । पहावया भरताचें मन । म्हणे पुत्रधर्माचें लक्षण । निजवचन बोलत ॥३५॥ तुम्ही तरी चवघेही पितृभक्त । आज्ञा नेमून गेला दशरथ । राज्या अभिषेकावा भरत । श्रीरघुनाथ वनवासी ॥३६॥ तुझे मातेचें वरदान । तिचेंही मागणें हेंचि जाण । भरतासी राज्यभिषिंचन । रघुनंदन वनवासी ॥३७॥ श्रीराम पितृवचनविश्वासी । वेगीं गेला वनवासासी । तूंही पाळीं पितृवाक्यासी। अभिषेकासी अंगीकारीं ॥३८॥ श्रीरामा अभिषेकावया निर्धारीं[३] । पूर्वी केली होती सामग्री । ते सिद्ध आहे माझ्या घरीं । तूं अंगीकारीं अभिषेक ॥३९॥ पितृवचन उल्लंघितां । अवश्य पाविजे नरकपाता । आग्रह न करावा भरता । तुज मी आतां अभिषेकीं ॥४०॥

वसिष्ठांची सूचना ऐकून भरताला मूर्च्छा, त्याचा विलाप, मातेची निंदा : ऐकोनि वसिष्ठाचें वचन । भरत पडिला मूर्च्छापन्न । दीर्घ मांडिलें रुदन । आक्रंदें पूर्ण बोलत ॥४१॥ कैकेयी हरिखे[४] जाली रांड । जळो तिचें काळें तोंड । वनवासाचें पाखांड[५] । तिणेंचि वितंड[६] वाढविलें ॥४२॥ कैकेयी केवळ परम नष्ट । भाके गोंविला पति वरिष्ठ । तिचें मागणें पाप स्पष्ट । तो राज्यपट[७] मी नेघें ॥४३॥

राज्याभिषेकाला भरताचा नकार, त्यामुळे वसिष्ठांना आनंद : वसिष्ठा तुज करितों नमन । किती पाहसी माझें मन । वाचोनियां रघुनंदन । अभिषिंचन मी नेघें ॥४४॥ श्रीरामासी सांडोनियां वनीं । जरी मी बैसलों अभिषिंचनी । तरी मी जालों मद्यपानी । मातृगमनी अति नष्ट ॥४५॥ तुझे शिवोनियां चरण । पूर्वी वाहिली श्रीरामाची आण । तेंचि माझें अति प्रमाण । पुढतीं आपण न पुसावें ॥४६॥ म्हणोनि चरणीं ठेविला माथा । येथोनि मागुती गुरुनाथा । राज्याभिषेकाची कथा । मजही आतां न पुसावी ॥४७॥ ऐकोनि भरताचें वचन । वसिष्ठ जाला सुखसंपन्न । हृदयीं धरिला आलिंगून । म्हणे अति सज्ञान[८] तूं होसी ॥४८॥

वसिष्ठांसह सर्वांचे रामदर्शनासाठी प्रयाण : तुझ्या सवें घेवोनि माता । भेटी येईन मी रघुनाथा ।

---

शब्दार्थ - १. घातक, २. सूर्य, ३. निश्चयात्मक, ४. आनंदाने, ५. खोटी गोष्ट, ६. मोठे, ७. राज्याधिकार, ८. शहाणा.

भरतें चरणीं ठेविला माथा । सभाग्यता आजी माझी ॥४९॥ सद्‌गुरू जाला सुप्रसन्न । भरतें त्राहाटिलें[1] निशाण । सेना सन्नद्ध[2] करा संपूर्ण । शीघ्र गमन वनवासा ॥५०॥ हरिखें नाचत भरत । आजी देखेन श्रीरघुनाथ । माझे पुरतील मनोरथ । कृतकार्यार्थ मी होईन ॥५१॥ श्रीराम भेटावया तत्काळीं । भरत निघालासे सदळीं[3] । नगरीं हर्षें पिटिली टाळी । वना सकळीं निघावया ॥५२॥ होईल श्रीरामदर्शन । उद्यमी[4] चालती संपूर्ण । उभय लाभीं ठेवोनि मन । निघाले जन अयोध्येचे ॥५३॥

पौराश्च निर्ययुः सर्वे समवायेन नैगमाः । रामदर्शनसंहृष्टाः सर्वाः प्रकृतयस्तदा ॥५॥

श्रीरामप्रेमी नागरिकांची दर्शनोत्सुकतेमुळे तारांबळ, धावपळ : वाणियें[5] सिद्ध केले पसारे । सोवनी सोनार जोशी वेव्हारे[6] । दुसी दिंडें घेतलीं थोरें । गौळीं खिल्लारें थापटिलीं ॥५४॥ चालिल्या पक्वान्नपरवडी[7] । दुधा दह्यांच्या कावडी । तेलियें घेतल्या तेलाच्या जोडी । कापडघोडीं चाट्यांचीं[8] ॥५५॥ तांबोळी बांधिलीं आटकीं । ब्राह्मणीं बांधिली धोटकी । मायबापां न पुसतां एकी । चोरोनि मार्गीं लागली एक ॥५६॥ पुत्रालागीं धांवे माता । स्त्री-पुत्रालागीं निघे पिता । पुतण्यालागीं धावें चुलता । श्रीरघुनाथा पहावया ॥५७॥ भाडाईत भारवाहक । वोडे शिंपी नटनाटक । मणिकर रजक[9] नापिक । जळतारक निघाले ॥५८॥ सुतार शस्त्रकार रज्जुकार । मार्गीं विकरा होय अपार । घेवोनि चालिले पायतणांचे भार । मोची चांभार चालिले ॥५९॥ सकुटुंब निघाले समस्त । भाडें न मिळे देतां अर्थ । एक म्हणती निघा त्वरित । दुरी भरत अंतरला ॥६०॥ घरीं राखण न राहे कोणी । निघती येरयेरांवरी रुसोनी । श्रीराम पहावया नयनीं । उल्हास मनीं सर्वांच्या ॥६१॥ खरावरी[10] वळघोनी[10] । हर्षें निघाल्या कुलालपत्नी । श्रीराम देखावया नयनीं । अपमान मनीं सुखें साहिती ॥६२॥ अवघियांही पुढें। भाडेकरीं नेलें गाडे । राजस ठणकती बापुडे । त्यापाशीं भाडें जोडावया ॥६३॥ निघाले द्विजांचे संभार । संन्यासी चालिले अपार । नागवे चालिले दिगंबर । श्रीरामचंद्र पहावया ॥६४॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्तमास्थाय स्यंदनोत्तमम् । प्रययौ भरतः श्रीरामान्रामदर्शनकांक्षया ॥६॥
शतं सहस्राण्यश्वानां समारूढानि राघवम् ॥ षष्टी रथसहस्राणि धन्विनो विविधायुधाः ॥७॥
अग्रतः प्रययुस्तस्य सर्वे मंत्रिपुरोहिताः । अधिरुह्य हयैर्युक्तान्रथान्सूर्यरथोपमान् ॥८॥
नवनागसहस्राणि कल्पितानि यथाविधि । अन्वयुर्भरतं यांतं राजपुत्रं यशस्विनम् ॥९॥

भरताच्या सैन्याचे वर्णन : श्वेतवारुयुक्त[11] रथ । त्यावरी हर्षें बैसे भरत । शत्रुघ्नेंही प्रेरिला रथ । श्रीरघुनाथ भेटावया ॥६५॥ पालखीमाजी कौसल्या वाहूनी । आणि सुमित्रा दुसरी जननी । निघाल्या येरही राजपत्नी । श्रीरामदर्शनीं उद्यत ॥६६॥ कैकेयी माता न ये निःशेष । तीस झालें परम दुःख । ना रामराव ना भरत देख । काळें मुख केंवी दावूं ॥६७॥ वसिष्ठादि ऋषि समस्त । महंत प्रधानादि सुमंत । यांसी देवोनि उत्तम रथ । त्यांसमवेत निघाले ॥६८॥ षष्टिहायन[12] भद्रजातीं[13] । दहा सहस्र मत्त हस्ती । घंटा घागऱ्या पताका बहुती । दोहीं भागी शोभती भरताच्या ॥६९॥ अतिरथी महारथी । साठी सहस्र भद्रजाती । भरतापाठीसीं धांवती । रथ धडधडती सायुधीं ॥७०॥ रथांचिया गति विगती । एकापरीस एक दाविती । त्यांमाजि धनुष्याची वित्पत्ती । शस्त्रगती साटोपा ॥७१॥ शतसहस्र सुजाती वारू । निघाला वीरांचा संभारू । नाना अलंकारीं मनोहरू । करिती दुर्धरू सिंहनाद ॥७२॥ वारुवां बाधली मोहाळी[14] ।

---

शब्दार्थ -१. वाजविले, २. तयार, ३. सैन्यासह, ४. व्यापारी, धंदेवाले, ५. वाण्यांनी, ६. शिंपी, ७. पक्वानांचे प्रकार, ८. कापडाचे दुकानदारांची, ९. धोबी, १०. गाढवावर बसून, ११. पांढऱ्या घोड्यांचा, १२. साठ वर्षांचे, १३. हत्ती, १४. मोहोरकी.

अंगटोप रागावळी । पाखरा[१] झळकती तेजाळी[२] । वीर महाबळी आरूढले ॥७३॥ वारू तीन पायांवरी नाचती । हो हो मा मा जी जी करिती । दावोनियां अंतराळी गती । वारू थापटिती महावीर ॥७४॥ कांतिया[३] त्रिशूळ तोमर । भिंडीमाळ[४] चेंडू चक्र । गदा मुद्गल लहुडी[५] थोर थोर । आलें मोगर[६] पायांचे ॥७५॥ खेटक भालेजी अपार । पिलंगती[७] पायाचें मोगर । गर्जत आले परशुधर । मल्ल दुर्धर तळपती ॥७६॥ सेळी सावळी शक्तियुक्त । अलंगाईत बाणाईत । कोइतेकार अद्भुत । कटारहस्त लघुवेगी ॥७७॥ आडाऊ वोडणें थडकती । तळवे त्यांमाजी तळपती । हैकार थैकार पैं देती । वीर गर्जती पायांचे ॥७८॥ चतुरंगसेनासंभार । राघवसेना अति दुर्धर । भरत चालिला सत्वर । लागला गजर वाद्यांचा ॥७९॥ कुऱ्हाडे कात्या कोइते हस्तीं । भारापुढें वनें छेदिती । मातीकामें नेणों किती । भूमि सज्जिती चालावया ॥८०॥

**भरतसैन्य पाहू गैरसमजाने गुहक गंगाकिनारी युद्ध करण्यास सज्ज :** भार चालिला अति दुर्धर । ठाकले भागीरथीतीर । देखोनि भरताचा भार । गुहक थोर क्षोभला ॥८१॥ कैसा राज्यलोभ अति दुर्धर । सख्या बंधूस पाडिलें वैर । भरतें सज्जोनियां भार । श्रीरामचंद्रा मारूं जातो ॥८२॥ माझा स्वामी श्रीरघुनाथ । तयाचा हा करूं पाहे घात । मी रणीं विभांडीन भरत । सेना समस्त छेदीन ॥८३॥

अनु दशरथिं रामं पित्रा राज्याद्विवासितम् । सामात्यो राज्यलोभेन हंतुं भरत उद्यतः ॥१०॥
अद्य मे शरसंघातो मत्कार्मुकविनिःसृत : । निष्पतिष्यति गात्रेषु नरेषु गजयोधिषु ॥११॥
निविष्टा यत्र सेना सा सवाजिरथकुंजरा । तां च भूमिं करिष्यामि शरैः शोणितकर्दमाम् ॥१२॥
मम दाशरथी रामो भर्ता बंधु सुहृद्गुरुः । अहं तस्य हितार्थाय करिष्यामि सुदुष्करम् ॥१३॥

श्रीराम माझी माता पिता । श्रीराम माझा सुहृद भ्राता[८] । श्रीराम सद्गुरू निजात्मता । श्रीराम तत्वतां आत्मा माझा ॥८४॥ त्याचा करावया घात । सैन्येंसीं जातो भरत । त्याचा करीन मी निःपात । श्रीरामभक्त तैं सत्य ॥८५॥ श्रीरामाचा मी मेटकरी[९] । ठेविला आहे गंगातीरीं । भरत येवोनि कैसेपरी । परतीरीं उतरेल ॥८६॥ निषादांसी सांगे गुहक । जरी भरत येईल सकटक[१०] । दृढ राखावें गंगातटाक । गंगोदक शिवों नेदीं ॥८७॥ हे जरी आले युद्धासी । तरी मी ख्याती लावीन त्यांसीं । धडमुंडांकित पृथ्वीसी । क्षणार्धेंसीं मी करीन ॥८८॥ मारीन रथ वाजी कुंजर[११] । रणीं मारीन नरवीर । वाहतील अशुद्धाचे[१२] पूर । तैसें क्षात्र करीन ॥८९॥ श्रीरामाच्या निजकार्यार्था । निःशेष वेंचीन जीविता । येथोनियां पुढे भरता । त्या सर्वथा जाऊं नेदीं ॥९०॥ निधडे निषाद निःशंक । मेळवोनियां निजकटक । सन्नद्ध स्वयें गुहक । सेनासन्मुख पैं आला ॥९१॥

**भरताचे व गुहकांचे ऐक्य :** भरतासी सांगती सैनिक । युद्धासी आलासे गुहक । धरोनियां गंगेचें तटाक । गंगोदक शिवों नेदी ॥९२॥ एक म्हणती राजा निमाला निःशंक । म्हणोनि आम्हांसी पारखा[१३] जाला गुहक । ताहना फुटताती लोक । गंगोदक स्पर्शों नेदी ॥९३॥ गुहक बापुडें तें किती । त्यासी क्षणार्धें लावीन ख्याती । आज्ञा द्यावी आम्हांप्रती । कोपे दळपती[१४] पूसत ॥९४॥ विचारें बोलिला भरत । गुहक रामाचा अति आप्त । त्याचा न घेतां वृत्तांत । युद्धकंदनार्थ करूं नये ॥९५॥ भरत पुसे गुहकासी । तूं का युद्ध करूं पाहसी । येरू म्हणे तू अति बळेंसीं । मारूं कां जाशी श्रीरामा ॥९६॥ माझा स्वामी वनवासी । सगळ बळें मारूं पाहसी । हेंच वैर आम्हां तुम्हांसी । अति युद्धासी कारण ॥९७॥ तो म्हणे सद्गुरूचा

शब्दार्थ - १. घोड्यावरील झालर, २. तेजस्वी, ३. कोयते, ४. गोफण, ५. शस्त्रविशेष. ६. पायदळ, ७. पुढे जाती, ८. बंधू, ९. चौकीदार, १०. सैन्यासह, ११. हत्ती, १२. रक्ताचे, १३. परकी, १४. सेनापती.

द्वेष करी । तोचि आमुचा मुख्य वैरी । त्यासी निवटीन[1] शस्त्रधारीं । प्रतिज्ञा खरी हे माझी ॥९८॥ ऐकोनि गुहकाचा वचनार्थ । रथावरोनि पडिला भरत । दुःखे गडबडां लोळत । अवस्था प्राणांत ओढवली ॥९९॥ भरत म्हणे गुहकासी । वेगीं मज वधीं पापियासी । कैकेयीयें जोडिल्या पापराशी । केलों जगासी[2] अति निंद्य ॥१००॥ कैकेयी राज्यलोभाची थोरी । तेणें मी केलों रामाचा वैरी । तिचेनि मी निंद्य चराचरीं । दुःखसागरीं निमग्न ॥१॥ जो श्रीरामासी स्वयें द्वेषी । त्यासी उतरती तिन्ही मसी[3] । ते कैकेयी आर्जवाची मसी । माझ्या मुखासी लागली ॥२॥ तेणें मी झालों काळमुखा । मुख दाखवूं न शकें लोकां । कैकयीये दिधले परम दुःखा । तें कोणासी गुहका मी सांगू ॥३॥ गुहका तुझें मी धरितों चरण । वेगीं सोडोनि निर्वाणबाण । छेदीं माझें देहबंधन । पापा पुरश्चरण होईल ॥४॥ तूं श्रीरामाचा परम आप्त । तरी माझाही सखा निश्चित । माझा करावा वचनार्थ । प्रायश्चित्तार्थ देह छेदीं ॥५॥ ऐकोनि भरताचें वचन । गुहकें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले सुदृढ चरण । पडिलें आलिंगन आप्तत्वें ॥६॥ दोघांसही प्रेम पूर्ण । नयनीं स्वानंदजीवन[4] । गुहकें घातलें लोटांगण । काय आपण बोलत ॥७॥ श्रीरामीं ज्यासी पूर्ण भक्ती । तो मज आप्त त्रिजगतीं । तोचि माझा निजसांगाती । मी चरणार्थी[5] तयाचा ॥८॥

सुमंत गुहकाला भरताची खरी भूमिका समजावतो : तंव गुहकासी सांगे सुमंत । राज्य देतां न घे भरत । राज्यी अभिषेकावा रघुनाथ । वना असे जात आणावया ॥९॥ ऐकोनि सुमंताची गोष्टी । भरताचें प्रेम देखोनि दृष्टीं । गुहकें चरणीं घातली मिठी । म्हणे धन्य सृष्टीं भरता तूं ॥११०॥ गुहका सांगातें घेवोन । भरतें केले संध्यास्नान । करोनियां पितृतर्पण । गुहकासी आपण पूसत ॥११॥ गंगातीरीं एक राती । श्रीरामें केली होती वस्ती । शयन केलें कोणे स्थिती । तें मजप्रती दाखवीं ॥१२॥

गुहक भरताला श्रीरामांची निवासाची जागा दाखवितो, त्या दोघांचा संवाद : गुहक जो निषादपती[6] । तेणें भरता धरोनि हाती । जेथें श्रीरामें केली वस्ती । त्या स्थळाप्रती आणिला ॥१३॥ गुहक सांगे भरताजवळी । याचि इंगुदीवृक्षातळीं । श्रीराम राहिला महाबळीं । ये गंगाजळीं स्नान केलें ॥१४॥ याचि तृणसेजे[7] रघुनंदन । सीतेसहित केलें शयन । निद्रा न करीच लक्ष्मण । बहु प्रार्थना म्यां केली ॥१५॥ तो म्हणे श्रीरामसेवा समाधान । न करीं जडमूढशयन । ऐकता भरतासी आलें रुदन । मूर्च्छापन्न तो पडिला ॥१६॥ भरत पडिला मूर्च्छापन्न । शत्रुघ्न जाला अति उद्विग्न । कौसल्या सुमित्रा हडबडोन । आल्या धांवोन राज्यपत्न्या ॥१७॥ वनवासींची ऐकिली वार्ता । तेणें अति दुःख शत्रुघ्नभरतां । वनीं क्षेम रघुनाथा । लक्ष्मण सीता सुखें असती ॥१८॥ काय वनवासाची कथा । वेगीं सांगावी गुहका तत्त्वता । दुःखें रुदन करिती माता । श्रीरघुनाथाचेनि विरहें ॥१९॥ गुहक सांगता करी रुदन । ये वृक्षीं राहिला रघुनंदन । श्रीरामें सीतेसहित केले शयन । हे पावन तृणशय्या ॥१२०॥ वृक्ष वंदितो मी ओजा[8] । नित्य पूजितों तृणशेजा । पंथींच्या वंदितों पैं रजा । श्रीरघुराजपदनिष्ठा ॥२१॥

श्रीरामांना अरण्यजीवन कंठावे लागते म्हणून सर्वजण उद्विग्न : ऐकोनि गुहकाची वाणी । भरत लागे त्याचे चरणीं । म्हणे गुहका तूं धन्य त्रिभुवनीं । श्रीरामभजनीं शुद्ध प्रेम ॥२२॥ श्रीरामभावें गा संपूर्ण । तूं वंदिसी वृक्ष तृण । याहीपरता लाभ कोण । सूक्ष्मभजननिष्ठा ॥२३॥ धन्य धन्य

---

शब्दार्थ - १. ठार करीन, २. जगामध्ये, ३. काजळी, ४. आनंदाश्रू, ५. पायाची इच्छा करणारा, नोकर, ६. भिल्लांचा राजा, ७. गवतांच्या अंथरुणावर, ८. भक्तिपूर्वक.

गुहका तुझा भाव । तुज तुष्टला श्रीरामराव । फिटला देहबुद्धिसंदेह । निःसंदेह रामभजनीं ॥२४॥ गुहक निषाद अति अपवित्र । श्रीरामभजनें जाला पवित्र । दीनदयाळ श्रीरामचंद्र । नामें पवित्र महादोषी ॥२५॥ गुहकाची अनन्य भक्ती । देखोनि भरता अति प्रीती । विषाद सांडोनियां चित्तीं । जालें सांगाती जिवलग ॥२६॥ श्रीरामसीतातृणशेजार । कौसल्या देखोनि साचार । दुःख दाटलें दुर्धर । काय उत्तर बोलली ॥२७॥ सीता सती सुकुमार । राम सुकुमारां अति सुकुमार । सुमनशेज[1] खुपे साचार । तृणशेजार त्यांसी देखा ॥२८॥ राजान्नें सेविती पवित्र । त्यांसी लंघनें[2] त्रिरात्र । कैकेयीयें केलें हें विचित्र । सखे सावत्र दुःखी केले ॥२९॥

गुहक सर्वांना नौकेतून गंगेच्या परतीराला नेतो : ऐसी चालतां उपपत्ती[3] । निमेषामाजी गेली राती । उदया आला पैं गभस्ती[4] । निषादांप्रती गुहक बोले ॥१३०॥ भरत उतरेल पैलपार । नावा आणा रे अति सत्वर । घंटा पताका सालंकार । मृदु अरुवार बैसणिया ॥३१॥ रथवाजिहस्तियुक्त । स्तोम स्तोम जेथींचा[5] तेथ । कटक उतरेल समस्त । अति विस्मित तेणें भरत ॥३२॥ गुहक जो कां निषादपती । नावा घेवोनियां हातीं । स्वयें आला भरताप्रती । करी विनंती आरूढा जी ॥३३॥ वसिष्ठांचे चरणांवरी । गुहक लोटांगण करी । तुम्ही तारक भवसागरीं । स्वामी नावेवरी बैसावें ॥३४॥ वसिष्ठे देखोनि गुहकासी । निजात्मप्रीतीं आलिंगी त्यासी । आजिंचा तारक तूं आम्हां होसी । परपारासी न्यावया ॥३५॥ गुहक म्हणे श्रीगुरूनाथा । तारक तुझी कृपा तत्वतां । कृपेनें हात ठेविजे माथां । मग मी समस्तां तारीन ॥३६॥ ऐसी गुहक बोलता बोली । वसिष्ठासी निजखूण पावली । हरिखें पिटोनियां टाळी । नावेजवळी तो आला ॥३७॥ वसिष्ठादि महंत थोर । त्यांसी नाव दिधली स्वतंत्र । ते नव्हेती पैं परतंत्र । भवसमुद्रतारक ॥३८॥ राजपत्न्या अति सुकुमार । त्यांसी नाव दिधली थोर । मृदु आस्तरण परिकर[6] । तेथें समग्र बैसविल्या ॥३९॥ भरत शत्रुघ्न नावेवरी । निशाणें त्राहाटिल्या भेरी । नाना वाद्येंसीं जयजयकारीं । वेगी परपारीं उतरले ॥१४०॥ भरत पुसे गुहकातें । सैन्य लावावें कोणें पंथें । तो म्हणे मी येतों सांगातें । भुयाळातें[7] घेवोनी ॥४१॥ गुहक अति हर्षयुक्तें । चालिला भरताचे सांगातें । दृष्टीं पहावया श्रीरामातें । बाह्य स्वार्थातें सांडूनी ॥४२॥ मुमुक्षुवा साधनीं अति प्रीती । तैसी गुहका श्रीरामभक्ती । भुयाळ घेवोनि सांगातीं । मार्ग शोधिती अतिनिष्ठा ॥४३॥ भरतगुहकांचा विवाद । दोघां अनुतापसंवाद । एकाजनार्दनीं निजबोध । परमानंद रामकथा ॥४४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां भरतवनाभिगमनगुहकसंवादो नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥ ओंव्या ॥१४४॥ ॥ श्लोक १३ ॥

## अध्याय तेरावा

### भरताचे चित्रकूटावर आगमन

स्नानसंध्या व त्रिवेणीला साष्टांग प्रणिपात : श्रीरामचंद्राय नमः ॥ भरतें गंगा उतरोन । केलें स्नान संध्या तर्पण । आजींची वस्ती प्रयागस्थान । म्हणोनि निशाणें त्राहाटिलीं ॥१॥ रथ गज वाजी वीरश्रेणी[8] । चालतां मार्ग न पुरे धरणी । पुढे देखिली त्रिवेणी । दूत गर्जोनी सांगती ॥२॥ देखोनी त्रिवेणी भरत शत्रुघ्न । दोघी घातले लोटांगण । त्यजोनियां पादत्राण । चरणचालीं निघालें ॥३॥ वसिष्ठादि ऋषीश्वर । चरणीं चालती सत्वर । देखोनि त्रिवेणीचें तीर । जयजयकार तिहीं केला ॥४॥

---

शब्दार्थ - १. फुलांचा बिछाना, २. उपोषणे, ३. तर्कांच्या गोष्टी, ४. सूर्य, ५. थवा, ६. सुंदर, सुखावह, ७. वाटाड्यांना, ८. वीरांचे समुदाय.

**गोदान, पिंडदान, धनदान :** देवोनि लक्षानुलक्ष गोदानें । भरतशत्रुघ्नें केलीं स्नानें । तीर्थश्राद्ध पिंडदानें । पितृतर्पणें तिहीं केली ।।५।। तीर्थ उपवास मुंडन[1] । रायासी नाहीं हे बंधन । वसिष्ठ गुरु सज्ञान । तीर्थविधान तो करवी ।।६।। मागतयांचें निवे मन । तैसें वांटविलें धन । सुखी केले तीर्थवासी ब्राह्मण । दीनजन सुखी केलें ।।७।। द्रव्य वांटिता भरत । मागते जाले कृतार्थ । सुखी केले तीर्थस्थ । श्रीरघुनाथ भेटो मज ।।८।। द्विज बोलती द्विजापासीं । श्रीराम आला होता तीर्थासी । निःशेष द्रव्य नाहीं त्यापासीं । वल्कलवासी जटाधारी ।।९।। त्याचे देखतां श्रीमुख । तीर्था सकळां जालें सुख । त्यापुढें द्रव्य तुच्छ देख । अलोलिक सुख रामीं ।।१०।।

**भरद्वाज सामारे येताच भरताचे वंदन :** भरद्वाज येवोनि साउमा[2] । तेणें आश्रमा नेलें श्रीरामा । तोचि जाणे श्रीराममहिमा । मूर्खा आम्हां न कळेचि ।।११।। तीर्थींचे ब्राह्मण लोलुप[3] बहुत । वल्कलधारी श्रीरधुनाथ । द्रव्य वांटील हा राजसुत । असेल गुप्त धन यापासीं ।।१२।। अति समर्थ श्रीरघुपती । वना नवचे[4] रित्या हातीं । द्रव्य वांटील हा तीर्थीं । द्रव्यलोभार्थी ब्राह्मण ।।१३।। जेथवरी द्रव्यद्वारांअभिमान । जेथवरी ज्ञानगर्व गहन । त्यासी श्रीरामचें महिमान । स्वप्नीही जाण लक्षेना ।।१४।। लोभेही श्रीरामाचें मुख । पाहतां जालें आम्हां सुख । परी महिमा आम्ही नेणों मूर्ख । सुखदायक श्रीराम ।।१५।। वाल्मीकिपाशीं संपूर्ण । ज्ञानकांडाचें श्रवण । भरद्वाजें केलें आपण । अति सावधान श्रद्धेनें ।।१६।। जालिया श्रवणनिष्पत्ती । श्रीराम देखे सर्वांभूतीं । यालागीं त्याची श्रीरामीं भक्ती । भावे श्रीरघुपति स्वाश्रमा नेला ।।१७।। ऐसिया ब्राह्मणांची कथा । ऐकोनि भरताची अवस्था । श्रीराम सर्वांसी सुखदाता । मज अभाग्यता मायेची ।।१८।। करोनि वसिष्ठासी नमन । भरत बोलिला आपण । भरद्वाजें पूजिला रघुनंदन । त्याचें दर्शन आम्ही घेऊं ।।१९।। वसिष्ठ म्हणे धन्य वाणी । हेंचिं होते माझे मनीं । भरद्वाज ऋषिशिरोमणी । चला तत्क्षणीं भेटीसी ।।२०।। कटक[5] ठेवोनी गंगातीरीं । भरतवसिष्ठादिऋषीश्वरीं । भरद्वाजआश्रमाभीतरीं । आले झडकरी भेटीसी ।।२१।।

**गैरसमजामुळे भारद्वाजांचा भरतावर दोषारोप :** भरद्वाज उठोनि आपण । वसिष्ठा घातलें लोटांगण । वसिष्ठें दिधलें आलिंगन । समाधान दोघांसी ।।२२।। इतर ऋषिजन । भरद्वाज वंदी आपण । भरत आणि शत्रुघ्न । घालिती लोटांगण भरद्वाजा ।।२३।। भरद्वाजें त्या दोघांसी । आलिंगिले हृदयासीं । स्वागत पुसोनि तयांसी । काय त्यांपासीं बोलत ।।२४।।

**भरद्धाज उवाच –**

**कच्चिन्न तस्य रामस्य धार्मिकस्य क्षमावतः । त्यक्तस्नेहो राज्यलोभान्न निहंतुमिहागतः ।।१।।**

**कच्चिन्न तस्यपापस्य पापं कर्त्तुमिहेच्छसि । अकंटकं भोक्तुमना राज्यं तस्यनुजस्यच ।।२।।**

**न खल्वकार्यं कार्यं ते पाप तस्मिन्महात्मनि । यदसौ त्वद्यते पित्रा वनवासे विवासितः ।।३।।**

भरद्वाज म्हणे भरता । सज्जूनियां सेना समस्ता । वनीं वधूं जासी रघूनाथा । राज्यलोभार्था लक्षोनी ।।२५।। राज्य भोगावया निष्कंटक[6] । वधूं पाहसी रघुकुळटिळक । पापकारी तूं अति मूर्ख । परम दुःख पावसी ।।२६।। मिळाल्या देवदैत्यदानव । यक्ष राक्षस आणि मानव । रणीं न जिंके श्रीराघव । तो तू बाळभावें[7] केवी वधिसी ।।२७।। श्रीरामची क्रोधभृकुटी । रणी आटील[8] सकळ सृष्टी । तेथें तुझी कायसी गोष्टी । रुद्रें[9] संकटीं राहू न शके ।।२८।। सैन्य श्रीरामाचें सूपर्ण । तें तंव युद्ध न करी जाण । क्षोभलिया लक्ष्मण । घेईल प्राण दोघांचा ।।२९।। भरता

---

**शब्दार्थ –** १. क्षौरविधी, २. सामोरा, ३. लोभी, ४. जाणार, नाही, ५. सैन्य, ६. निर्वैर शत्रुत्वरहित, ७. बालकाप्रमाणे, अज्ञानी होऊन, ८, नष्ट करील, ९. शंभर.

मानीं माझें वचन । तूं अयोध्येसी जाय परतोन । चौदा वर्षे राज्य करोन । रिघावे शरण श्रीरामा ।।३०।।

ते ऐकून भरत उद्विग्न : भरद्वाजाचें वचन । वज्रपाय अति तीक्ष्ण । हृदयीं भेदलें दारुण । भरत प्राण सोडूं पाहे ।।३१।। ऐकतां भरद्वाजाचें वचन । भरत पडे मूर्च्छापन्न । म्हणे मज कां नये मरण । करी रुदन अति दुःखे ।।३२।। कैकेयी राज्यलोभाची थोरी । जगीं मीं केलों रामाचा वैरी । भरत जावोनि वनांतरी । श्रीरामातें मारी जग बोले ।।३३।। कैकेयी मातेचा अति अनर्थ । वना जावोनियां भरत । करील श्रीरामाचा घात । जगाआंत अपवादू[1] ।।३४।। तुम्हांसारिखे साधुसंत । म्हणती वना जावोनियां भरत । करील श्रीरामाचा घात । तरी देहांत नव्हे माझा ।।३५।। मी काय वज्राचा घडियेलों । कीं अपेशाचा ओतियेलों । दुःखा दुर्धर जन्मलों । निंदेचा जालों मेरू जैसा ।।३६।। मी तंव अपेशाचं आयतन[2] । अपकीर्तीचें अधिष्ठान[3] । जळो माझें काळें वदन । देहबंधन छेदवेना ।।३७।। श्रीरामद्वेषी पापी परम । राज्यलोभी अति अधम । शाप देवोनि दुर्गम । मज भस्म करीं वेगीं ।।३८।। ऐसें म्हणोन भरतें आपण । धरिल भरद्वाजाचे चरण । माझिया पापा पुरश्चरण[4] । शाप दारुण स्वामीचा ।।३९।। ऐसें बोलतां आलें रुदन । भरत पडिला मूर्च्छापन्न । देखोनि भरताचें प्रेम पूर्ण । आलें स्फुंदन भरद्वाजा ।।४०।।

भरताच्या निर्मळ हृदयाचा परिचय होताच भारद्वाजांना संतोष : सर्वांग जालें रोमांकित । प्रेमें चळचळां कांपत । म्हणे धन्य धन्य तूं भरत । प्रेम अद्भुत श्रीरामीं ।।४१।। उचलोनियां दोहीं हातीं । आलिंगिला अति प्रीतीं । रामभक्ताचे पायींची माती । अहोरातीं[5] मी वंदीं ।।४२।। श्रीरामीं ज्याची अनन्य[6] प्रीती । श्रीरामीं ज्याची अनन्य गती । श्रीरामीं ज्याची परम भक्ती । निजसांगाती तो माझा ।।४३।। श्रीरामीं ज्याचें अनन्य भजन । त्याचें आम्ही करूं ध्यान-पूजन । त्याचेनि आम्हां समाधान । सत्व वचन हें माझें ।।४४।। भरता भरद्वाजा प्रेम पूर्ण । देखोनि हर्षले ऋषिगण । जयजयकारें केलें गर्जन । सुख संपूर्ण वसिष्ठा ।।४५।।

वसिष्ठांची हमी : वसिष्ठा बोलिला आपण । भरता राज्य मी देतां जाण । तेणें शिवोन माझे चरण । निर्वाण[7] आण वाहिली ।।४६।। सांडोनियां रघुनाथा । राज्याभिषेक होय भरता । ते म्यां वधिली निजमातापिता । सद्गुरुघाता म्यां केलें ।।४७।। श्रीरामाची जे राजधानी । ते तंव माझी सखी जननी । ते जैं भोगी अभिषिंचनीं । तैं मातृगमनी मी जालों ।।४८।। ऐसी वाहोनियां आण । भरत राज्य न घेचि जाण । शीघ्र करावया वनप्रयाण । तेंही कारण अवधारा ।।४९।। भरत जावोनि रामाप्रती । राज्य द्यावया रघुपती । अयोध्ये आणावा मागुती । ऐशा प्रीतीं जातसे ।।५०।।

वसिष्ठवाणीमुळे भारद्वाजांचे मतपरिवर्तन : ऐकोनि भरताचें निर्वाण । भरद्वाजा विस्मय पूर्ण । हरिखे नाचोनि आपण । दिधलें आलिंगन भरतासी ।।५१।। पुढती नमन पुढती आलिंगन । पुढती त्याचे वंदी चरण । भरद्वाजासी प्रेम पूर्ण । आपणा आपण विसरला ।।५२।। वाल्मीकिगुरूची आज्ञा पूर्ण । भगवद्भक्तां द्यावें आलिंगन । तेणें शरीर अति पावन । समाधान जीवाशिवां ।।५३।। ऐसिया अनन्य प्रीतीं । भरतपूजनीं वाढली भक्ती । वसिष्ठ पूजावा ब्रह्ममूर्ती । उल्हास चित्तीं भरद्वाजा ।।५४।। वसिष्ठ केवळ ब्रह्म पूर्ण । परम भाग्यें त्याचें आगमन । भरत रामभक्त अनन्य । करूं पूजन यथोक्त ।।५५।।

---

शब्दार्थ - १.आळ, २. स्थान, ३. आश्रय, ४. समाप्ती, ५. दिवस-रात्र, अखंड, सतत, ६. एकच एक निष्ठा, श्रद्धा उरापोटी बाळगून, एकनिष्ठ, ७. निर्धाराची शपथ.

भारद्वाजांचे भरत, वसिष्ठांना सैन्यासह स्वागताचे निमंत्रण : केलें वसिष्ठासी नमन । आजी माझें घ्यावे पूजन । माझें आश्रमीं निजभोजन । ऋषि जनसमयोगें[1] ॥५६॥ वसिष्ठासवें ऋषिगण । आले असती कोण कोण । ज्याचें करितां नामस्मरण । पुनश्चरण महादोषां ॥५७॥ कश्यप कात्यायन वामदेव । जाबालि मुद्गल मार्कंडेय । गौतम ऋषि महानुभाव । ऋषिसमुदाव निमंत्रिला ॥५८॥ मग बोलिला भरताप्रती । भोजना यावें तुम्हीं समस्तीं । आम्ही दोघे येऊं ऋषिपंक्ती । चाड बहुतीं तुज काय ॥५९॥ भरता जितुके तुझें कटक । अश्व गज अवघे रामसेवक । ते मज पूजापूज्य[2] आवश्यक । त्या समस्तां देख आणावें ॥६०॥ समग्र सेना उतरावयासी । माझें आश्रमीं अवकाश त्यांसी । प्रेमें आज्ञापी भरतासी । अति उल्हासीं भरद्वाज ॥६१॥

पूर्वी जमदग्नींनी कामधेनूला पाचारण केले असता जो विपरीत अनुभव आला तसा या वेळी येऊ नये म्हणून तपःसामर्थ्याने स्वागताची तयारी : करावया ऋषींचें पूजन । जरी आणावी कामधेनु मागोन । तरी होईल जमदग्नीचें चिन्ह । राजे देखोनि अभिलाषिती ॥६२॥

समाधिमवलंब्याथ भरतस्य तु पुजनें । वसिष्ठप्रमुखा विप्राः संप्राप्ता मेऽद्य चाश्रमम् ॥४॥

परमं रत्नमासाद्य दिव्यज्ञानान्वितो मुनिः । आतिथ्यार्थे भरद्वाजः स्वर्गभोगान्समानयत् ॥५॥

स्वागत समारंभाचे सविस्तर वर्णन : भरद्वाज महामुनी । बैसोनियां अनुष्ठानीं । स्वर्ग आणिला आकर्षूनी । पूजेलागोनी आश्रमा ॥६३॥ घरें चत्वरें[3] पट्टशाळा । अश्वशाळा गजशाळा । जनां बैसावया विश्रामशाळा । अति विशाळा विचित्र ॥६४॥ चित्रवन नंदनवन । तेथें आणिलें खांडववन । तेणें आश्रम शोभायमान । राजे ऋषिजन विस्मित ॥६५॥ घृतकुल्या[4] मधुकुल्या[4] । आम्ररसें[5] वापी भरल्या । द्राक्षारसें नद्या वाहूं लागल्या । सरिता[6] भरल्या दधिदुग्धें ॥६६॥ नानापरींच्या शिखरिणी । तेणें भरल्या पुष्करिणी । शर्करेचे पर्वत धरणीं । फळश्रेणी स्वादिष्ट ॥६७॥ चंपक कल्पद्रुम मांदार । पारिजातादि विचित्र हार । पूजावया ऋषि राजकुमर । सुमनसंभार सुवासी ॥६८॥ उगाळोनि शुद्ध चंदन । भरिले कनकाचे रांजण । षड्रसेंसीं दिव्यान्न । नानापक्वान्नपरवडी ॥६९॥ ऐसीं दिव्यान्नें पूर्ण सुवर्णताटीं । नानारसीं भरिल्या वाटी । परमानंदे पडे मिठी । शाखा गोमटीं लोणचीं ॥७०॥ ठायीं ठायीं अति निर्मळ । सुवासिक शीतळ जळ । सेवितांचे पै तत्काळ । सबाह्य सकळ निवताती ॥७१॥ दिव्यांगना अति सुंदरी । विंझणे घेवोनियां करीं । वीजिताति[7] ढाळें[8] करी । त्यांसी जेवणारीं भाळिजी ॥७२॥ पाहतां त्यांच्या तोंडाकडे । जेवणें अंतरलें पुढें । जेवणार झाले वेडे । अंगनांकडे पाहतांचि ॥७३॥ त्यांच्या मुखाची पाहतां वास[9] । देखतां हावभावविलास । हातींचे हातीं राहिले घांस । जाला स्पर्श वायसाचा ॥७४॥ जेवण अंतरलें पुढे । सचैल स्नान करणें घडे । सकामी ठकले रोकडे । अति तफफडें तडफडतीं ॥७५॥ श्रीरामाचे निजभक्त । अंगनामुखीं नव्हती आसक्त । ग्रासोग्रासीं राम स्मरत । जाले तृप्त स्वानंदें ॥७६॥

कवले कवले रामं स्मृत्वां भुंजंति योगिनः । तत्र भोक्ता हरिःसाक्षान्मुक्तः स्याञ्चात्र संशयः ॥६॥

पंक्तीचा लाभ घेणारे रामनामस्मरणाने जन्ममरण मुक्त झाले : ग्रासोग्रासीं श्रीराम स्मरत । त्या भोजनीं भोक्ता श्रीरघुनाथ । जेवणार ते नित्यमुक्त । श्रुतिसंमत शास्त्रार्थे ॥७७॥ ऐसिये भोजनाची स्थिती । सकाम हे निष्कामप्रयुक्ती । जे जे रसीं जी आसक्तीं । तो तो सेविती रस

---

शब्दार्थ - १. ऋषिमंडळींसह, २. पूजेने मान सन्मान करण्यास पात्र, ३. चवाठे, ४. दुधाची व मधाची परिपूर्णता, ५. आंब्याच्या रसाने, ६. नद्या, ७. वारा घालतात, ८. हळूहळू, ९. ठेवण.

॥७८॥ वसिष्ठतार्टी परवडी चोख । तैसेंचि ताट सेविती रंक । उंच नीच नाहीं देख । जेविलें कटक समतृप्ती ॥७९॥ नलगे मागणें नाहीं वाढणें । ठायींचीं सरों नेणती अन्नें । जें जें आवडे ज्याकारणें । तें तें सेवणें तेणें गोडी ॥८०॥ क्षुधा हरपली तेथ । तृष्णा तृष्णेसी जाली तृप्त । तृप्त जालें सैन्य समस्त । कोणी अतृप्त असेना ॥८१॥ अश्व गज न खाती तृण । त्यांसीही ओगरिले[1] मिष्टान्न । कोरडे न पाजिती जीवन । करिती क्षीरपान स्वादिष्ठ ॥८२॥ चाटे[2] भाटे उदमी लोक । वाणी वेव्हारे सकळिक । रजक आदिकरूनि चर्मक । एकैक तृप्त जाले ॥८३॥ वसिष्ठ भरत आणि शत्रुघ्न । ऋषींनीं केलें शुद्धाचमन । सभा बैसली प्रसन्नवदन । सुख संपूर्ण सर्वांसी ॥८४॥ टिळे माळा गंधाक्षता । विडे दिधले समस्तां । पूजिता श्रीरामाच्या भक्तां । उल्हासता भरद्वाजा ॥८५॥

या देवाभिलषित समारंभाला भ्रमर, शुक, सारिका, कोकिळा व वनशोभेची सुसंवादी सुरेल साथ : वनश्री[3] मघमघीत मनोहर । परागें उधळती सपूर । सामगायनें अति मधुर । तैसे भ्रमर रुणझुणती ॥८६॥ कोकिळा वेदवादें कूजती । वेदांत पारवीं घुमघुमिती । तांडव नाचे उमापती । तैसीं नाचती मयूरें ॥८७॥ ब्रह्मज्ञानाच्या निजयुक्ती । फळाशा सांडोनि शुक बोलती । पिंगळे त्यांसीं संवादती । संतोषती सारिका ॥८८॥ विवेकद्राक्षांचे पैं घड । देखतां डोळ्यांचें पुरे कोड । सकळ गोडियां ते गोड । सुखसुरवाड[4] सेवलिया ॥८९॥ हाहाहूहू गंधर्व दोन्ही । मधुरस्वरें गाती गाणीं । रंभी उर्वशी विलासिनी । रंगीं नाचणी[6] नाचती ॥९०॥ प्रकाश न लोपे सूर्यापुढें । ऐसे रत्नदीप चोखडे । उजळले वाडेंकोडें[7]। चहूंकडे लखलखित ॥९१॥ ज्या दीपांची जळजळ । पुढें काजळी माथां काजळ । ते मालवोनि सकळ । चिद्रत्नांचे उजळिले दीप ॥९२॥ प्रतिपुरुषा भिन्न ओवरी[8] । रत्नमंचक त्यामाझारीं । पुरुषाप्रती पांच नारी । सेवेवरी तिष्ठती ॥९३॥ एकी करिती चरणक्षाळण । एकी त्या चरणां संवाहन । एकी चंदन एकी दिव्यव्यंजन[9] । विडिया जाण एकी देती ॥९४॥ अप्सरा पुरुषांसी बोलती । आम्ही न येऊं अयोध्येप्रती । आजींची क्रमिलिया राती । जाऊं मागुती स्वर्गासी ॥९५॥ भरद्वाजाचे ध्यानज्ञानें । आमचें येथें आगमन । दिवस उगवतांचि जाण । स्वर्गगमन आम्हांसी ॥९६॥ जवळी असतां अप्सरांसी । श्रीरामभक्त उदास त्यांसी । भूतीं देखतां भगवंतासी । स्त्रीपुरुषांसी अभावो ॥९७॥ मुळीं आत्मा आत्मीं नाहीं । तेथें स्त्रीपुरुष मिथ्या पाहीं । स्त्रीपुरुषभास भासे देहीं । ते देहबुद्धि नाहीं हरीभक्तां ॥९८॥ विषयी पुरुष सहितनारी । स्वर्ग भोगिती घरोघरीं । भरद्वाज ऐसियेपरी । पूजा करी भरताची ॥९९॥

सर्व उपस्थितांची तृप्ती : कोणी नाहीं मळिन वास । कोणी नाहीं मळिनकेश[10] । कोणी नाहीं मळिनभास[11] । स्वर्गउल्हास सर्वांसी ॥१००॥ अश्व गज खर उष्ट्र । मिष्टान्ने भक्षिती तृणचर । जळप्राशनीं प्राशिती क्षीर । केले विचित्र भरद्वाजें ॥१॥ वाल्मीकिरामायणाआंत । स्वर्गभोग लिहिले बहुत । तितुका नाहीं वाढविला ग्रंथ । संकळितार्थ[12] बोलिलों ॥२॥ भरद्वाजाचें परम ज्ञान । स्वगृहीं क्षणैक धरोनि ध्यान । स्वर्गभोगा आकर्षून । केले पूजन समस्तां ॥३॥ राव रंक समसमान । भरद्वाजें केले पूजन । आश्चर्य करिती सकळजन । भरत शत्रुघ्न विस्मित ॥४॥ स्वर्गी केवळ अमृतपान । देवांसी स्वर्गी न मिळे अन्न । अमृतासहित मिष्टान्न । दिधलें भोजन भरद्वाजें ॥५॥ नाहीं आणिली कामधेनू । नाहीं वेंचिले संचित धनू । स्वर्ग आणिला आकर्षूनू । क्षणार्ध ध्यान धरोनियां ॥६॥ ऐसें ऋषिवर्य बोलती । भरत शत्रुघ्न चकित

---

शब्दार्थ - १. वाढिले, २ कापडवाले, ३. वनशोभा, ४. भरपूर, ५. सुखाचा सुकाळ, ६. नृत्यांगना, ७. आनंदाने, ८. खोली, ९. उत्तम पंखे, १०. मळकट वस्त्रांचा, ११. मळिन कांतीचा, १२. संक्षेपाने, थोडक्यात.

चित्तीं । संवाद करिता सरली राती । उदयप्राप्ती होऊं आली ॥७॥

भारद्वाजांचा भरताला प्रेमाशीर्वाद : भरत पुसे भरद्वाजासी । स्वामींनी आज्ञा द्यावी आम्हासी । जाऊं श्रीरामभेटीसी । म्हणोनि पायांसी लागला ॥८॥ भरद्वाजें आल्हादयुक्त । प्रीतीनें[1] आलिंगिला भरत । चित्रकूटीं श्रीरघुनाथ । तुज निश्चित भेटेल ॥९॥ ऐकोनि भरद्वाजाची गोष्टी । भरतें बांधिली शकुनगांठी । चरण वंदिले लल्लाटीं । पाठी थापटी भरद्वाज ॥१०॥

भारद्वाजांचे सर्व ऋषींना वंदन, वसिष्ठांचा आशीर्वाद : भरद्वाजें येवोनि आपण । वसिष्ठादि ऋषिगण । त्यांसी घातलें लोटांगण । वंदिले चरण वसिष्ठाचे ॥११॥ वसिष्ठाचे निजचरण । स्वर्गासी वोळगे पाकशासन । तुझनि चरणप्रभावें जाण । केलें पूजन भरताचें ॥१२॥ वसिष्ठ म्हणे भरद्वाजासी । सकळसिद्धि निगर्वापासीं । तेणें निगर्वें तूं नांदसी । वंद्य सर्वांसी तिहीं लोकीं ॥१३॥

सर्वांचे चित्रकूटी प्रयाण : अनुमोदोनि भरद्वाजासी । ऋषि निघाले पुसोनि त्यासी । भरतें रथीं बैसवोनि समस्तांसी । निजसैन्यासी सिद्ध केलें ॥१४॥ शिबिके[2] बैसवूनियां जननी । रथीं बंधु बैसले दोनी । लागली वाजंत्रांची ध्वनी । गडगर्जनीं[3] निघाले ॥१५॥ उतरोनियां यमुनातीर । ठाकिला चित्रकूट गिरिवर । अवघीं केला जयजयकार । हर्षनिर्भर श्रीरामें ॥१६॥ देखोनि चित्रकूट पर्वत । भरत आनंदें नाचत । आजि भेटेल रघुनाथ । उल्हासयुक्त शत्रुघ्न ॥१७॥ भरता श्रीरामदर्शन । तें सुख बोलूं शकेल कोण । एकाजनार्दना शरण । जीवप्राण येरयेरां ॥१८॥ भरता श्रीरामासीं भेटी । हरिखें ओसंडेल[4] सृष्टी । सुख न बोलवे गोष्टी । पडे मिठी परब्रह्मीं ॥१९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकाया भरद्वाजाश्रमगमनभरतचित्रकूटपर्वतप्रवेशो नाम त्रयोदशोध्यायः ॥१३॥ ओंव्या ॥११९॥ ॥ श्लोक ॥६॥ एवं ॥१२५॥

## अध्याय चौदावा

### श्रीसमांकडून दुष्ट कावळ्याला शिक्षा

चित्रकूटावर श्रीरामांची दैनंदिन चर्या, लक्ष्मणाची सेवा : श्रीसीतारामाभ्या नमः । येरीकडे श्रीरघुनाथ । चित्रकूट पर्वताआंत । अग्निहोत्र सीता समवेत । नित्य वेदोक्त[5] प्रतिपाळी ॥१॥ श्रीरामसेवेसी सौमित्र । पर्णशाळा केली विचित्र । श्रीरामाचें अग्निहोत्र । अहोरात्र संरक्षी ॥२॥ विचित्र आणी फळें मूळें । नित्य निर्वाह पुरवी जळें । काष्ठें आणोनियां प्रबळें । अग्नि सोज्ज्वळ स्वयें रक्षी ॥३॥ रामसीतेचें चरणक्षाळण । नित्य नेमें करी लक्ष्मण । जैसीं लक्ष्मीनारायण । या बुद्धीं पूर्ण पूजित ॥४॥ विधिविधान जाणे श्रीराम । दर्शपौर्णमासिक होम । मृगमांसें होमसंभ्रम[6] । चालवी नेम सौमित्र ॥५॥ श्रीरामाचे सेवेवरी । शरीर वंचीना[7] । तिळभरी धनुष्यबाण घेवोनि करीं । मृगें मारी होमार्थ ॥६॥ धन्य त्या मृगांचें जीवित । त्यांचे मासें होम करी श्रीरघुनाथ । ज्यांची फळें स्वयें सेवित । ते वृक्ष नित्यमुक्त श्रीरामें ॥७॥ इध्माबर्हिकुशास्तरण[8]। श्रीरामें उद्धरले तृण । पायांतळी येती पाशाण । तेहि जाण नित्यमुक्त ॥८॥ सन्मान करिता निर्मळ नीरें[9]। तेथे उद्धरिलीं मत्स्य मगरें । वनवासी श्रीरामचंद्रें । वनीं वनचरें उद्धरिलीं ॥९॥ करावया जगदुद्धारण । श्रीरामाचें वनप्रयाण । ज्या ज्या घडलें रामदर्शन । ते ते जाण उद्धरिलें ॥१०॥ श्रीराम देखावया दृष्टीं । पाहिजेत भाग्याचिया कोटी । धन्य धन्य तेचि सृष्टीं । ज्यांसी भेटी श्रीरामीं ॥११॥ श्रीरामकथा नित्य श्रवण । सावध परिसे तो धन्य धन्य । निर्लोभ रामकथा–

शब्दार्थ – १. आनंदवून, २. पालखीमध्ये, ३. मोठ्या गर्जनेने, ४. भरेल, ५. वेदांत सांगितल्याप्रमाणे, ६. होमसंबंधी खटपट, ७. चुकवीना, ८. समिधा, दर्भ आणि दर्भासन, ९. उदकाने.

पठन । त्याचेनि पावन जडमूढ ॥१२॥ त्याचे मुखीं श्रीरामनाम । धन्य धन्य त्याचा जन्म । भक्तीनें नित्य स्मरती नाम । त्यांसी श्रीराम उद्धरी ॥१३॥ ऐसा श्रीराममहिमा गहन । बोलतां वेदां पडे मौन। तं मी केंवी बोलों दीन । कथानुसंधान अवधारा ॥१४॥ श्रीरामाचें अग्निहोत्र । चालवावया अति तत्पर । मृग मारोनि अति पवित्र । आणिले सत्वर लक्ष्मणें ॥१५॥ पूर्णिमाअमावास्यादि याग । श्रीराम ते वधी मृग । यागार्थ केले विभाग । मांसार्थी काग[1] तेथें आले ॥१६॥

सीतेला आश्रमात ठेवून लक्ष्मण फळे आणावयास वनात गेला असता सीतेवर गंधर्वरूपी कावळ्याचे आक्रमण : लक्ष्मण आणावया गेला फळें । मासार्थी टपती कावळे । राम सीतेसी म्हणे अबळे । हीं पक्षिकुळें निवारी ॥१७॥

तद्रामवचनात्सीता काकेभ्यः पर्यरक्षत । इतश्चेतश्च तां काको वारयंतीं पुनर्नुनः ॥१॥

यस्या हारांतरचरः कामचारी विहंगमः । काकेनारोध्यमानां तां सा मुमोह तदातुरम् ॥२॥

पक्षतुंडनखाग्रैश्च कोपयामास कोपनाम् । सीतामभिपपातैव ततश्चुक्रोध राघवः ॥३॥

सीता रामाचे आज्ञेवरी । सवेग येवोनि बाहेरी । स्वयें कागातें निवारी । राजकुमारी सुकुमार ॥१८॥ सुंदर देखोनियां तिसी । सुदसुव गंधर्व अभिलाषी । धरोनियां कागवेषासी । सीतेपासीं तो आला ॥१९॥ स्वयें हांकिता सीता सती । इतर काग तत्काळ पळती । तो पळेना कामासक्ती । पुढतपुढती झेंपावे ॥२०॥ काग हांकितां सरोखें[2] । सुटलें कंचुकीचें[3] पाखें[4] । पालव[5] चळला अंगझोकें । तंव हृदय देखे तो काग ॥२१॥ मुक्तकुच दिसे सुंदरी । हार रुळे कुचांवरी । देखोनि काग कामाचारी । हृदयावरी झेंपावे ॥२२॥ पांखें झडपोनियां तिसी । नखें ओरबाडिलें कुचासी । चंचूनें चुंबोनि मुखासी । केली कासावीस जानकी ॥२३॥ कागपक्षझडपेचें ऊर्मीं[6] । सीता आक्रंदोनी पडे भूमीं । काग कामाचारी अधर्मी । हृदयआरामीं विचरत ॥२४॥ काग बैसला हृदयावरी । सीता कराग्रें निवारी । चंतुक्षतें करितां करीं । हाका मारी आक्रोशें ॥२५॥

सीतेचा आक्रोश ऐकून श्रीरामांनी कावळ्यावर इषीकास्त्र (दर्भाचे अस्त्र) सोडले : ऐकोनि सीतेची दीर्घ हांक । वेगीं आला रघुकुळटिळक । दुष्ट देखोनियां काक । दर्भशिखा देख मोकलिली ॥२६॥

सोभिमंत्र्य शरैषीकामैषीकास्त्रेण वीर्यवान् । काकं तमभिहतः ससर्ज पुरुषर्षभः ॥४॥

स तेनाभिहतः काकास्त्रींल्लोकान्पपर्यगात्ततः । यत्र यत्रागमत्काकस्तत्र तत्र ददर्श ह ॥५॥

इषीकां भूतसंकाशा स राम पुनरागमत् । सीतायास्तत्र पश्यंत्या मानुषीमैरयद्गिरम् ॥६॥

ते श्रीरामाची दर्भशिखा । इषीकामंत्रें मंत्रोनि देखा । सोडितां पाठी लागली काका । धगधगीत अर्कसमप्राय[7] ॥२७॥ सवेग पळतां काका । पाठी लागली इषीका । परिभ्रमता[8] तिहीं लोकां । पाठीलाग देखा सोडीना ॥२८॥

तो कावळा हतबल, अगतिक होऊन शेवटी नारदांच्या सांगण्यावरून श्रीरामांना शरण : श्रीरामइषीका देखोन । इंद्र सांडी सिंहासन । तेथें काकासी राखे कोण । करी पलायन देवांपासीं ॥२९॥ श्रीरामइषीका देखोन । इंद्र कुबेर वरुण । धाकें करिती पलायन । यमही आपण चळीं कांपे ॥३०॥ श्रीरामइषीका देखोन । कुळाचळ कंपायमान । इषीका वंदी चतुरानन । घाली लोटांगण शिव भवानी ॥३१॥ काग जाय जे जे ठायीं । इषीका पावे लवलाहीं । काक हिंदतां लोकीं तिहीं । ठाव नाहीं रहावया ॥३२॥ धाकें काक रिघे पाताळीं । तेथें दैत्यदानव कांपती चळीं ।

---

शब्दार्थ - १. कावळे, २. रागाने, ३. चोळीचे, ४. बिरडे, गाठ, ५. पदर, ६. बलात्काराने, ७. सूर्याप्रमाणे प्रखर, ८. फिरता फिरता.

श्रीरामइषीका करील होळी । तिहीं तत्काळीं दवडिलें ॥३३॥ काक हिंडतां दशदिशीं । अत्यंत जाला कासाविसी । कोठें न लभे आश्रय त्यासी । तेणें नारदांसी देखिलें ॥३४॥ धरिलें नारदाच्या पायांसी । म्हणे इषीका निवारीं देवऋषी । तो म्हणे शरण रिघें रामासी । तो शरणागतासी न मारी ॥३५॥ ऐकोनि नारदाचें वचन । काकें केलें पुनरागमन । श्रीरामा तुझ्या चरणां शरण । माझे प्राण वांचवी ॥३६॥ वंदोनि श्रीराम लोटांगणी । काक बोले मनुष्यवाणी । इषीका धगधगीत देखोनी । आश्चर्य मानी जानकी ॥३७॥

कावळा मनुष्यवाणीने श्रीरामांची प्रार्थना करतो : काम म्हणे गा रघुनाथा । थोर अपराध माझे माथां । शरण आलों मी तुज सर्वथा । न मारावें आतां राघवा ॥३८॥ नारदसद्गुरूचें वचन । तेणें मी तुज आलों शरण । शरणागताचें रक्षण । माझें मरण तें निवारीं ॥३९॥ मरणाभेणें जी पळतां । थोर शिणलों गा रघुनाथा । सद्गुरूने हांत ठेविला माथां । म्हणोनि आता शरण आलों ॥४०॥ नारदे सांगितलें कानीं । जानकीं माता जगज्जननी ते । म्यां अभिलाषिली कामेंकरूनी । मातृगमनी महादोषी ॥४१॥ महापातकें ज्याच्या माथां । तोही श्रीराम स्मरतां । पातकें जावोनि तत्वता । होय सरता[1] वैकुंठी ॥४२॥ श्रीराम दों अक्षरां-साठी । पातकें जळती कोट्यानुकोटी । तो नर सरता होय वैकुंठीं । बैसे पाटीं[2] ब्रह्मयाच्या ॥४३॥ श्रीरामनामाचा प्रताप । पापें निर्दळती[3] आकल्प । माझें तंव पाप अल्प । मी निष्पाप श्रीरामें ॥४४॥ श्रीरामनाम स्मरतां वाक्पुटीं । कलिकल्मषां[4] होय तुटी । तो श्रीराम देखतां दृष्टीं । पापाची गोष्टी मज नाहीं ॥४५॥ श्रीराममूर्ति आणितां ध्यानीं । सकळ पापा होय धुणी[5] । तो श्रीराम देखिला नयनीं । पाप त्रिभुवनीं मज नाहीं ॥४६॥ ऐसें बोलोनि आपण । काकें वंदिले श्रीरामचरण । सीतेसी घातलें लोटांगण । म्हणे कृपा पूर्ण मज करीं ॥४७॥

सीतेच्या स्तनांचे चुंबन घेतल्याबद्दल कावळ्याची क्षमायाचना : म्हणे कुचाग्रीं लावितां हात । बाळकाची सत्ता बहुत । तैसें मी तुझें ज्येष्ठ अपत्य । जाण निश्चित जानकी ॥४८॥ एक कुच धरोनि हातीं । दुजा घाली मुखाप्रती । बाळसत्तेची ख्याती । तें तुजप्रती म्यां केलें ॥४९॥ पतीस कुचसत्ता एकांती । बाळकासी कुचसत्ता लोकांती[6] । ते म्यां केलें तुजप्रती । जाण निश्चिती जानकिये ॥५०॥ पतीस कुचसत्ता मध्य रात्रीं । बाळकाची सत्ता अहोरात्रीं । तें म्यां केलें तुजप्रती । जाण निश्चितीं जानकिये ॥५१॥ रजस्वला जालिया कांता । पतीने शिवों नये सर्वथा । तेथेंही बाळक होय झोंबता । तैसे तत्वतां म्यां केलें ॥५२॥ करेकरोनियां जाण । बाळक करी कुचप्राशन[7] । म्याही करेंकरोनि पूर्ण । केलें स्तनपान तुझें मातें ॥५३॥ गाईचा गोरा गाईवरी उडे । तरी मातेसी कोप न चढे । ते म्हणे तान्हें बाळक वेडें । तैसें मजकडे पाहीं माते ॥५४॥ तूं तंव चराचरजननी । आम्हीं अपत्यें पशुसमानी । क्षोभ न धरावा मनीं । सखी जननी तूं आम्हां ॥५५॥

सीतेची दयाबुद्धी व श्रीरामास प्रार्थना : ऐकोनि काकाचें बोलणें । सीता कळवळिली निजमनें । यासी राखावें जीवें प्राणें । कृपा करणें श्रीरामा ॥५६॥ तुझेनियां बोले । म्यां यावरी निर्वाण केलें । तें नवचे निवारिलें । अटक पडिलें जानकिये ॥५७॥ ऐकें स्वामी रघुनाथा । मारूं नये शरणागता । कैसेनि याच्या करिसी घाता । यासी सर्वथा रक्षावें ॥५८॥ सर्वशक्तीं सर्वसत्ता । स्वयें रक्षावें शरणागता । ऐसीं ब्रीदें[8] तुझी रघुनाथा । कैशापरी आतां या वधिसी ॥५९॥ इषीका अनिवार निश्चित । तरी राखावा शरणागत । तैंच तुझें सत्य व्रत ।

---

शब्दार्थ - १. श्रेष्ठ, २. बरोबरीला, ३. नाहीशी होतात, ४. कलियुगातील पापाला, ५. नाश, ६. सर्व लोकांदेखत, ७. स्तनपान, ८. वाणा.

प्रताप यथार्थ पैं तुझा ॥६०॥ जिणें मारविलें कागातें । तेचि म्हणे वांचवा त्याते । ऐसें लाघव[1] केलें रघुनाथें । स्वयें कर्मातें अलिप्त ॥६१॥ कळला काकाचा वृत्तांत । जाणोनि सीतेचें मनोगत । काय बोलिला श्रीरघुनाथ । सावचित्त अवधारा ॥६२॥

अमोघं क्रियतामस्त्रमेकमंगं परित्यज । किमंगं शातयतु ते शरैषीका ब्रवीहि मे ॥७॥
एतावद्धि मया शक्यं तव कर्तुं प्रियं खग । एकांगहीनं ह्यस्त्रेण जीवितं मरणाद्धरम् ॥८॥

**अस्त्रांचे अमोघत्व रक्षण करण्यासाठी कावळ्याचा एक डोळा नष्ट केला :** ऐकोनि सीतेचा वचनार्थ । काकासी नाभीं[2] म्हणे श्रीरघुनाथ । तुझें वांचवावया जीवित । ऐक हितार्थ सांगेन ॥६३॥ इषीका अनिवार निश्चित । तिणें करावा तुझा प्राणांत । परी तूं जालासी शरणागत । यालागीं तिष्ठत राहिलीसे ॥६४॥ इषीका अनिवार दारुण । तुवां वांचवावया प्राण । एकांग देसी आपण । तेणें निवारण चालेल ॥६५॥ तुझ्या हितालागीं जाण । तुज मी सांगतों आपण । एकांग करोनि क्षीण । आपुला प्राण वांचवीं ॥६६॥ काक म्हणे श्रीरघुनाथा । तुझी आज्ञा मी वंदिन माथां । एकांग घे सुखरूपता । इषीकाघाता चुकवावें ॥६७॥ श्रीराम म्हणे काकासी । कोण अंग तूं देतोसी । तें देवोनि इषीकेसी । तुज निश्चयेंसी राखीन ॥६८॥ काक म्हणे ऐक आतां । माझे इंद्रियांची व्यवस्था । अपराध असेल ज्याचे माथां । त्याचे करीं घाता इषीकास्त्रें ॥६९॥ उजव्या डोळां जानकी माता । डावेनि अभिलाषिली तत्वतां । इषीका घालोनि त्याचे माथां । त्यासी रघुनाथां दंडावें ॥७०॥ ऐसी ऐकतांची वाणी । इषीका प्रवेशे वामनयनीं । काम मूर्च्छित पडे रणीं । रामें तत्क्षणीं सावध केला ॥७१॥ घेतला माझा वाम नयन । हें कागासी नाहीं ज्ञान । मी जालों अंगहीन । हेंही चिन्ह तो नेणें ॥७२॥ मागें पाहताचि त्या काका । न देखतांचि इषीका । हर्षें वंदी रघुकुलटिळका । माझ्या मरणदुःखा निवारिलें ॥७३॥ अद्यापि काकदेहीं नवलाहो । जराजर्जरित न पवे क्षयो । श्वापदीं धरितां कां लागली घावो । तोचि पहाहो मृत्यु काका ॥७४॥

**श्रीरामांची कृपा लाभल्यामुळे दोन डोळ्यांचे कार्य एका डोळ्याकडे आले :** यापरी श्रीरामराव । काकाचा वारिला मृत्युभाव । समस्तां वाटला नवलाव । कृपाळु पहा हो श्रीराम ॥७५॥ जो तो म्हणे काक काणा । हें दुःख काकाचिये मना । जग निंदितें मज जाणा । श्रीरामें व्यंकणा[3] मी केलों ॥७६॥ कृपेनें वांचविलें संपूर्ण । ते कृपेस आलें व्यंकणपण । ऐकोनि हांसला रघुनंदन । काय वचन बोलिला ॥७७॥ सामर्थ्य देतों उजव्या बुबुळा । एकचि बुबुळ दोहीं डोळां । तुझी वाढेल देखणी कळा । देखणा[4] सकळांमाजि होसी ॥७८॥ कृपेचें जें देखणपण जाण । जो तो जाण स्वयें वानी ॥७९॥ दशाहाच्या[5] पिंडासी । देखणेपण आहे काकासी । त्यातें देखे पापराशी । त्यां पिंडासी नातळे ॥८०॥ श्रीरामकृपेस्तव जाण । पापपुण्याचे देखणेपण । काकासी पावलें संपूर्ण । दशाहचिन्ह जग देखे ॥८१॥

**कावळ्याने सीतेच्या स्तनांचे चुंबन घेतल्याबद्दल नरकतुल्य किळसवाणी घाण भक्षण करण्याचा त्याला शाप :** चंचूनें चुंबिलें सीतेसी । तेणें मुखें भक्षितो निरयासी[6] । रामें देखणें दिधल्या डोळ्यासी । पापपुण्यासी तेणे देखे ॥८२॥ ऐसियापरी रघुनंदनें । काकाचें निवारिलें मरणें । वाचविला देखणेपण । समाधानें सुखी केला ॥८३॥ शरण आणोनी काकासी । श्रीरामें सुखी केलें सीतेसी । काका वांचवोनी कृपेसी । महादोषियासी सुखी केलें ॥८४॥ तंव येरीकडे निजभरत । श्रीरामभेटीसी उद्यत । गजभारेंसीं असे येत । तोही कथार्थ अवधारा ॥८५॥

---

शब्दार्थ - १. युक्ती, २. भिऊ नको, ३. काणा, ४. पाहणारा, ५. दहाव्या दिवसाच्या, ६. नरकाला.

श्रीरामभरतां आलिंगन । तेणें जीवशिवां समाधान । एकाजनार्दना शरण । आनंदधन श्रीरामकथा ॥८६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां काकनिग्रहो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥१४॥ ओव्या ॥८६॥ श्लोक ॥८॥ एवं ॥९४॥

## अध्याय पंधरावा

### श्रीराम-भरतभेट

**भरताचे चित्रकूटाकडे प्रयाण :** श्रीरामचंद्राय नमः । देखोनि चित्रकूट पर्वत । अत्यंत हरखिला भरत । देखावया श्रीरघुनाथ । उल्हास अद्भुत सर्वांसी ॥१॥ सेन शृंगारिली मनोहर । वीरीं केले नाना शृंगार । गर्जत घेवोनि गजभार । भरत सत्वर चालिला ॥२॥ कोईते कातिया कुऱ्हाडे । वन छेदिती सैन्यापुढें । वेगीं भूमि सजिती मातियेडे[1] । गज रथ घोडे चालावया ॥३॥ अश्वगजांचा कडकडाट । रथ चालिले घडघडाट । सैन्य चालतां न पुरे वाट । रजें वैकुंठ व्यापिलें ॥४॥ चरणरज अति उद्भट । लोकलोकांतर त्यजोनि स्पष्ट । ठाकोनि जावें वैकुंठ । हा नेटपाट[2] रजाचा ॥५॥ गज गर्जती गहिरे[3] । वारू हिंसती[4] एकसरें । तुरें वाजती अपारें । गिरा गंभीर वीर गर्जती ॥६॥ निशाण भेरी वाजंतरें । डोल ढमके बुरंगे घोरें । तडक फुटलें एकसरें । गिरिकंदरें दुमदुमिली ॥७॥

अथ रामे तदासीने लक्ष्मणे चाभिवीक्ष्यति । तस्य सैन्यस्य महतो रौद्र आसीन्महास्वन ॥१॥
तेन शब्देन महता वर्धता विप्रबोधिताः । गुहां संत्यज्य वै व्याघ्रा निलिल्युर्बिलवाससि ॥२॥
ऋक्षाश्चोत्ससृजुर्वृक्षान्प्रपेतुर्हरयो गुहाम् । खमुत्पेतुः खगास्तत्र मृगाश्चापि विदुद्रुवुः ॥३॥

**सैन्याच्या गजबजाटाने, घडाघडाटाने त्या परिसरांतील वनचर व रहिवाशांची धांदल :** ऐकतां श्रीराम सौमित्र । भरतसेनेचा नाद थोर । दुमदुमिलें गिरिकंदर । श्वापदें क्रूर गजबजिलीं ॥८॥ नाद न समायें गगनीं । नादें कंपायमान अवनी[5] । श्वापदें पळती जीव घेवोनी । पक्षी त्रासोनी कलकलिती ॥९॥ व्याघ्र पळाले सांडोनि जाळी । वराह[6] दडाले महीबिळीं । सर्प रिघाले वारुळीं । दडी पाताळीं तिहीं दिधली ॥१०॥ तरस तरग मृग मुंगसें । धाकें पळती अपैसें[7] । जळींचें खळबळिले मासे । भूतें आक्रोशें धुगधुगिती ॥११॥ ऐकतां धाकाची दणदण । आस्वलें विसरली गुणगुण । तींही पळालीं जीव घेवोन । कंदरारण्य[8] टाकिलें ॥१२॥ धाकें पळती नरवानर । पळती वनगजांचे भार । सिंहांसी धाक लागला थोर । मारू कुंजर[9] विसरले ॥१३॥ धाकें पळती रानम्हैसे । पळतां मागें पुढे न दिसे । रानगाई पळती आक्रोशें । हाणिती वत्सें हंबरडे ॥१४॥

विलीना विविशुर्भीताः स्ववस्तिषु द्विजातयः । विद्याधराः खमत्पेतुः किन्नरा भेजिरे दिशः ॥४॥
तमभ्यासमनुप्राप्तं तस्य देशस्य लक्ष्मणः । सैन्यस्य चागतं शब्दमिति रामे न्यवेदयेत् ॥५॥

वनौकें[10] कांपती चळचळीं । वडवाघुळें रिघती ढोलीं । वृक्ष उन्मळूती समूळीं । देती आरोळी भयाची ॥१५॥ द्विजवरांचे शिष्य बहुत । धाकें चळावळां कांपत । धोत्रामध्ये मुतत । एका अधोवात होंसरले[11] ॥१६॥ धाक घेतला उद्भट । दांत वाजती खटखट । एकांचे धाकें फुगलें पोट । एकांचे कंठ शोकले ॥१७॥ ब्राह्मण शांतिपाठ जपती । तरी धीर धरूं न शकती चित्तीं । सांडोनियां श्रीरघुनाथाप्रती । पळाले समस्त गुहेमाजी ॥१८॥ विद्याधर आणि किन्नर । धाके लंघिती दिशांचे पार । नादे त्रासिले दुर्धर । वनींचे वनचर पळाले ॥१९॥ नादें

---

शब्दार्थ – १. जमीन साफ करणारे, २. निश्चय, ३. गंभीर, ४. खिंकाळतात, ५. पृथ्वी, ६. डुक्कर, ७. आपोआप, ८. गुहा व अरण्ये, ९. हत्ती, १०. रानातील, घरे, ११. प्राप्त झाले, निघाले.

भिल्ल पळाले धाकेंसीं । ते सांगती श्रीरामासी । वेगीं पळवा सीतेसी । आलें वनासी परचक्र ॥२०॥ जानकी देखोनि सुंदरी । हिरोनि नेतील क्षणामाझारीं । इसी तुम्हीं धरोनि करीं । गिरिकंदरीं रिघावें ॥२१॥ तुम्ही अवघे दोघे जण । जरी आहेती धनुष्यबाण । तरी कितीक कराल आंगवण[1] । सैन्य दारुण आलेंसे ॥२२॥

हंत लक्ष्मण पश्येह सुमित्रा सुप्रजास्त्वया । भीमस्तनितगंभीरं तुमुलः श्रूयते स्वनः ॥६॥

कोणाचे सैन्य आहे त्याचा शोध घेण्याचा लक्ष्मणाला आदेश : श्रीराम म्हणे गा लक्ष्मणा । कोण्या रायाची हे सेना । करीत आलीसे गर्जना । आणोनि मना मज सांगें ॥२३॥ चतुरा सुमित्रानंदना । तूं ओळखिसी राजचिन्हां । कोण राव आला वना । आणुनी मना मज सांगें ॥२४॥ ये वनीं वाल्मीकाश्रमासी । राजे भेटों येती त्यासी । अथवा आले पारधीसी । आणोनि मनासी मज सांगें ॥२५॥ ऐकोनि श्रीरामाच्या वचना । वंदोनिया त्याचे चरणा । सवेग पाहूं आला सेना । राजचिन्हां लक्षित ॥२६॥

ध्वजपताकांवरून अयोध्येची सेना आली म्हणून लक्ष्मणाचा संताप व लढाईची सज्जता : देखो ध्वजांकीं[2] दशरथ । हे तंव राघवसेना समस्त । वनीं वधावया रघुनाथ । सेनेसीं भरत आलासे ॥२७॥ कैसा राज्यलोभाचा स्वार्थ । सखा बंधु जो आमुचा आप्त । तो वैराकारा[3] पेटला भरत । वनीं रघुनाथ वधूं आला ॥२८॥ पहिलें श्रीरामीं दावी प्रेम । डोळां आंसू अंगीं रोम । तोचि मारावया श्रीराम । वना अधम स्वयें आला ॥२९॥ श्रीरामाचा अनन्य भक्त । मी जीवें असतां पैं जीत । कैसेनि मारील रघुनाथ । ससैन्य भरत निवटीन ॥३०॥ आजी माझे तिखट बाणीं । धडमुंडाकित करीन धरणी । भरत शत्रुघ्न हे दोनी । अर्धक्षणीं मारीन ॥३१॥ श्रीरामाचा निजघातकी । तो बंधु मारितां नव्हें पातकी । यश निरवेल तिहीं लोकीं । मनीं निष्कट[4] नेम केला ॥३२॥ रागें धनुष्या वाहिला[5] गुण । आरोळी देवोनि लक्ष्मण । सैन्यासन्मुख आला आपण । निर्वाणबाण सज्जोनी ॥३३॥ सौमित्राचेनि गिरागजरें[6] । दुमदुमिलीं गिरिकंदरें । डळमळलीं मेरुशिखरें । धरा भारें कांपत ॥३४॥ आधींच शेषाचा अवतार । श्रीरामविरहें कोपला थोर । नेत्रीं ज्वाळा निघती दुर्धर । तंव सुरनर कांपती ॥३५॥ सन्मुख देखोनि सौमित्रासी । सेनासैनिक कासाविसी । परस्परें बोलती येरायेरांसी[7] । हाही आम्हांसी स्वामी होय ॥३६॥ जैसे भरत आणि शत्रुघ्न । तैसेचि श्रीराम आणि लक्ष्मण । येथें कोणासी झुंजेल कोण । विषम[8] पूर्ण ओढवलें ॥३७॥ पुढें झुंजतां स्वामी संपूर्ण । मागें पळतां उणेपण । सौमित्रें सज्जिला धनुष्यबाण । काय आपण करावें ॥३८॥ राहिली श्रीरामाची भेटी । युद्ध मांडले उठाउठीं । सरली संग्रामाची गोष्टी । शस्त्रें पोटीं घालावीं ॥३९॥ सन्मुख झुंजता स्वामीसीं तुटी । संग्रामीं देवो नये पाटीं । क्षात्रधर्माची अटक[9] मोठी । शस्त्रें[9] पोटीं घालावीं ॥४०॥ आतां श्रीराम न दिसे दृष्टी । विचाराची खुंटली गोष्टी । क्षात्रधर्माची अटक मोठी । शस्त्रें पोटी घालावीं ॥४१॥ ऐकोनि सौमित्राचा सिंहनाद । श्रीराम जाला सन्नद्ध[10] । दारूण मांडिलेंसे युद्ध । म्हणोनि सक्रोध चालिला ॥४२॥ श्रीराम योद्धा निरीक्षी नयना[11] । तंव देखे दशरथसेना । मग तो म्हणे गा लक्ष्मणा । आपआपणा युद्ध केंवी ॥४३॥ आमची सेना आमचे प्रधान । आमचे बंधु भरत शत्रुघ्न । तुज युद्धासी काय कारण । निर्वाणबाण कां घेसी ॥४४॥

संपन्नं राज्यमिच्छंस्तु व्यक्तं राज्याभिषेचनम् । आवां हंतुं समभ्येति कैकेय्या भरत सुतः ॥७॥

---

शब्दार्थ – १. पराक्रम, २. ध्वजावरील, चिन्हाचे, ३. वैर करण्यास, ४. निश्चयपूर्वक, ५. दोरी, प्रत्यंचा, ६. वाणीच्या गर्जनेने, ७. एकमेकांस, ८. संकट, ९. प्रतिबंध, १०. तयार, ११. निरखून पाही.

सौमित्र म्हणे रघुनंदना । सन्नद्ध बाहे[1] करोनियां सेना । भरत आला असे वना । आम्हां दोघांजणां मारावया ॥४५॥ माझ्या रुक्मपुंखबाणीं[2] । मारीन वीरांच्या श्रेणी[3] । भरत शत्रुघ्न पाडीन रणीं । रुधिरें[4] धरणी न्हाणीन ॥४६॥ जो श्रीरामादी दे संताप[5] । तो बंधु मारतां नाहीं पाप । श्रीरामकार्यार्थ साटोप । पाहें प्रताप रणरंगीं ॥४७॥ मी तंव तुझा अनन्य भृत्य[6] । जवळीं असतां जीवें जित[7] । कैसेनि तुज मारील भरत । करीन घात समस्तांचा ॥४८॥ ऐसें बोलोनि लक्ष्मण । करूं निघाला युद्धकंदन । तंव श्रीरामें धरिला धांवोन । म्हणे ऐसें आपण करूं नये ॥४९॥ त्यांचे युद्धासी आले कोण। नाहीं तिहीं सोडिला बाण । तंववरी जाण आपण । युद्ध दारुण करूं नये ॥५०॥

सुसंरब्धं तु भरतं लक्ष्मणं क्रोधमूर्च्छितम् । रामस्तु परिसांत्व्याथ वचनं चेदमब्रवीत् ॥८॥
किमत्र धनुषा कार्यमसिना वा सचर्मणा । महाबले महोत्साहे भरते स्वयमागते ॥९॥
विप्रियं कृतपूर्वं ते भरतेन कदा नु किम् । ईदृशं वा भयं तेऽद्य रतं यद्विशंकसे ॥१०॥
नहि ते निष्ठुरं वाच्यो भरतो नाप्रियं वचः । अहं ह्यप्रियमुक्तः स्यां भरतस्याप्रिये कृते ॥११॥

रामाने केलेली लक्ष्मणाची कानउघडणी : लक्ष्मणा तुजला काय जालें । कैंचें भय सांगसी बोलें । भरत आमुचें तान्हुलें । सैन्य आलें तें आमचेंचि ॥५१॥ येथें पारखें[8] आहे कोण । कोणाचा घेऊं पाहसी प्राण । युद्ध करीन म्हणसी दारुण । हें मूर्खपण क्रोधाचें ॥५२॥ भरत आम्हांसी पूर्वीपासूनी । विरूद्ध वदला नाहीं स्वप्नीं । तो वधील वना येवोनी । हे मिथ्या वाणी जल्पसी ॥५३॥ येथे काय धरिसी धनुष्यबाण । कोणावरी घेतोसी खर्गवोढण[9] । भरत माझा जीवप्राण । त्यावरी निर्वाण करूं नको ॥५४॥ सैन्य आमचें अंकित । त्याचा तूं करूं नये घात । क्रोध सांडोनि होईं शांत । ऐक वचनार्थ पैं माझा ॥५५॥ भरत वधील आम्हांलागूनी । हा भयसंकोच तुझे मनीं । भरतापासूनि विरुद्ध करणी । जागृती स्वप्नीं घडेना ॥५६॥ लक्ष्मणा तुज नाहीं ज्ञान । म्हणोनि होसी क्रोधायमान । तुज मी सांगेन मुळींची खूण । ते सावधान अवधारीं ॥५७॥

रामचंद्रांनी वर्णलेले सापिंड्य त्याचा प्रभाव : एक पिंडाचे[10] नित्योद्भूत । भरत आणि मी रघुनाथ । तुवां भरताचा करितां घात । मजही अनर्थ होऊं पाहे ॥५८॥ आम्हां दोघांचा एक प्राण । यालागीं गा विरुद्ध वचन । भरता न बोलावें आपण । माझी शिकवण मानावी ॥५९॥ विरुद्ध जें बोलसी भरता । तें चढेल माझिया माथां । ऐसें जाणोनि तत्वतां । विरुद्ध वार्ता न वदावी ॥६०॥ याचिपरी गा सज्ञान । भूतीं[11] देखतां गा भगवान । विरुद्ध न बोलती वचन । समाधान तेणें त्यांसी ॥६१॥ आणिक एक आहे चिन्ह । आम्हां चवघांचा एक प्राण । तेंही सांगेन लक्षण । सावधान अवधारीं ॥६२॥ पुत्रेष्टियाग[12] करी दशरथ । ऋष्यशृंग कर्ता तेथ । एक ताट पायसयुक्त । दिधलें निश्चित अग्निपुरुषें ॥६३॥ त्याचे केले चारी भाग । एका पिंडाचे आम्ही दोघ । सापत्नभागाचा विभाग । विकल्प दोघां आम्हां नाहीं ॥६४॥ प्रथम पायसाचे तीन भाग । घारीनें नेला कैकेयीचा भाग । दो भागांचे केले चार भाग । ते आम्ही चवघे एकपिंडी ॥६५॥ पांचवा भाग घारी नेत । तेणें ती जाली शापमुक्त । तिसी अंजनीजन्म प्राप्त । भाग उदरांत तियेच्या ॥६६॥ त्या भागाचा जाण निश्चित । जन्म पावला हनुमंत । यालागीं म्हणती अंजनीसुत । वायुसुत तोही एकें ॥६७॥ अंजनीउदरीं भाग संपूर्ण । यज्ञपुरुष जाण आपण । तिसीं विचरला[13] त्याचा प्राण । वायुनंदन या हेतू ॥६८॥ अर्धभागें

---

शब्दार्थ – १. बोलावी, २. स्वर्णमय (सोन्याच्या) पिसाऱ्याच्या बाणांनी, ३. पंक्ती, समूह, ४. रक्ताने, ५. आवेशयुक्त, ६. सेवक, ७. जिवंत, ८. परकी, ९. तरवार व ढाल, १०. शरीराचे, ११. प्राणिमात्राचे ठायी, १२. पुत्र प्रात्यर्थ यज्ञ, १३. प्रविष्ट झाला

आम्हा जन्म प्राप्त । सगळ्या भागाचा हनुमंत । यालागीं तो बळे अद्‌भुत । तिहीं लोकांत आतुर्बळी ॥६९॥ हा एक पिंडीचा पांचवा कां । सौमित्रा तुज असावा ठाउका । पुढें भेटेल पांचवा सखा । हनुमंत देखा सहाकारी ॥७०॥ पिंडभागांचें गुह्य ज्ञान । तें मी जाणें श्रीरघुनंदन । वेदशास्त्रां अटक पूर्ण । म्यां हें कथन सांगितलें ॥७१॥

तथोक्तो धर्मशीलेन भ्रात्रा तस्य हिते रतः । लक्ष्मणः प्रविवेशेव स्वानि गात्राणि लज्जया ॥१२॥
इति संभाष्यमाणस्तु रामः सौमित्रिणा सह । तां चमूं हर्षसंपूर्णां ददर्श सहसा तथा ॥१३॥
अवतीर्य धनुर्बाणं लक्ष्मणो लज्जयान्वितः । रामस्य पार्श्वमीये य परितस्थावधोमुखः ॥१४॥

लक्ष्मणाचा विस्मय : ऐकोनि श्रीरामाचें वचन । लक्ष्मण जाला विस्मयापन्न[1] । म्हणे आम्हां चौघांचा एक प्राण । भरत शत्रुघ्न भिन्न नव्हेती ॥७२॥ ऐसें विचारितां आपण । लक्ष्मण जाला लज्जायमान । युद्धक्रोध अति दारुण । हें पंण पैं माझें ॥७३॥ एवं अति लज्जायमान । उतरोनियां धनुष्याचा गुण । वंदोनि श्रीरामाचे चरण । जाला लक्ष्मण अति शांत ॥७४॥ विचार करी आपणा आपण । केवढें माझें मूर्खपण । भरत शत्रुघ्न आमचा प्राण । त्यांसी म्यां रण कां साधावें ॥७५॥ धन्य धन्य श्रीरामाचें ज्ञान । जाणे भूत भविष्य वर्तमान । माझें निरसोनी अज्ञान । समाधान मज दिधलें ॥७६॥ विरुद्ध कर्माचें अति दुःख । सांडोनि क्रोध निःशेख । श्रीरामाचे पाठीसीं देख । अधोमुख राहिला ॥७७॥

सैन्यातून श्रीरामांचा जयजयकार : श्रीरामें वारिला सौमित्र । सेनेनें देखोनि साचार । अवघीं केला जयजयकार । हर्षनिर्भर[2] सैन्यासी ॥७८॥ आम्ही न करितों रण । मागें न[3] वचों[3] परतोन । साहोनि सौमित्राचे बाण । त्यजितों प्राण क्षात्रधर्में ॥७९॥ येवढा आमचा अनर्थ । चुकवावया राम समर्थ । स्वधर्म रक्षी श्रीरघुनाथ । कृपावंत दीनांचा ॥८०॥ युद्धें स्वामिद्रोही समस्त । मागें पळतां नरकपात । क्षात्रधर्माचा अनर्थ । रामें निश्चित चुकविला ॥८१॥ करितां रामनामाचें स्मरण । सद्यः[4] अनर्थासी निर्दळण । तो राम देखिलिया जाण । जन्ममरण आम्हां नाहीं ॥८२॥ ऐसें सैनिक बोलती । श्रीरामाची करूनी स्तुती । अवघे आनंदें नाचती । श्रीरघुपति कृपाळु ॥८३॥ भरत भेटों आला वना । हर्ष सीतेचिया मना । देखोनियां निजसेना । तिसीं चौगुणा[5] आल्हाद ॥८४॥ येथें भेटोनियां भरत । श्रीरामा नेईल अयोध्ये-आंत । स्वराज्य पावेल रघुनाथ । हा भावार्थ सीतेचा ॥८५॥

निविष्टायां तु सेनायामागतो भरतस्तदा । ददर्श भ्रातरं हृष्टं शत्रुघ्नसहितो विभुः ॥१५॥

रामदर्शनाची भरताची उत्सुकता : आला ऐकोनि रघुनाथ । सैन्य राहवोनि समस्त । रथ सांडोनियां भरत । पायीं धांवत अनवाणी ॥८६॥ धनालागीं जेवीं कृपण । दुकाळियालागीं[6] मिष्टान्न । देखावया श्रीरामदर्शन । तैसें मन भरताचें ॥८७॥ चकोरा जैसें चंद्रकिरण । जीवनालागीं जैसा मीन । देखावया रघुनंदन । तैसे मन भरताचें ॥८८॥ चुकलिया निजबाळ । मातेसी भेटीची कळवळ । श्रीराम भेटावया तत्काळ । तैसी तळमळ भरतासी ॥८९॥ बहुकाळें आलिया भर्ता । आल्हादें भेटे पतिव्रता । तैसें भेटावया रघुनाथा । उल्हास चित्ता भरताचे ॥९०॥ वानरा आवडती चणे । गट करोनि गाली भरणें । तैसेंचि निजप्रेमें संपूर्णें । भेटे धांवोन श्रीरामा ॥९१॥ देखोनियां सोलीव केळें । वानर उडी घाली तत्काळें । तैसा आनंदकल्लोळें । सप्रेम आला भरत ॥९२॥ जीवासवें जैसा प्राण । तैसा भरतासवें शत्रुघ्न ।

---

शब्दार्थ - १. आश्चर्यचकित, २. मोठा आनंद, ३. गेलो नसतो, ४. तत्काल, ५. चौपट, ६. दुष्काळात सापडलेल्याला.

भेटावया श्रीरघुनंदन । उदित[1] मन[1] दोघांचें ॥९३॥ साकरेंसवें जेंवी गोडपण । सुमनासवें[2] सुवास संपूर्ण । तैसा भरतासवें शत्रुघ्न । रघुनंदन पहावया ॥९४॥ उदकासवें जैसें शीतपण । चंद्रासवें प्रभा पूर्ण । तेंवी भरतासवें शत्रुघ्न । रघुनंदन पहावया ॥९५॥

अथोपविष्टमासीनं सीतया लक्ष्मणेन च । ददर्श भरतः श्रीमान्दुखंशोकभयप्लुतः ॥१६॥
पादावप्राप्य रामस्य पपात भरतस्तदा । शत्रुघ्नश्चैव रामस्य ववंदे चरणे गुरुम् ॥१७॥
नावुभौ च समलिंग्य रामोऽप्यश्रूण्यवर्तयत् ॥

**सर्वांच्या भेटी व भावनाविष्कार :** श्रीराम सौमित्र आणि सीता । भरत जालासे देखता । उल्हास न संडे निजचित्ता । प्रेमावस्था नावरे ॥९६॥ धांवोनि धरिले दृढ चरण । सर्वेचि घातलें लोटांगण । अश्रुधारा स्रवती नयन । प्रेमें शत्रुघ्न लागला पायीं ॥९७॥ त्या दोघांचे गळती नयन । श्रीरामाचे स्रवती लोचन । तिघां पडिलें आलिंगन । त्रिवेणी पूर्ण होऊं सरली ॥९८॥ राम पूर्ण स्वयें गंगाजीवन[3] । भरत यमुना अति पावन । सरस्वती तो शत्रुघ्न । त्रिणी पूर्ण होऊं सरली ॥९९॥ संगमीं दिसे त्रिवेणीरूप । पुढें गंगोदक निष्पाप । भरतशत्रुघ्न निर्विकल्प । श्रीरामरूप तेंवि जाले ॥१००॥ लवणजळा[4] जाली भेटी । तैसी खेंवा[5] पडली मिठी । विरोनि तें येरयेरांच्या पोटीं । ऐक्यसंतुष्टी सुखरूप ॥१॥ अग्निकर्पूरा[6] आलिंगन । परम प्रेमें देदीप्यमान । सवेंचि दोनी हरपोन[7] । होती गमन निर्विकारी ॥२॥ तैसे भरत आणि शत्रुघ्न । श्रीरामा देतां आलिंगन । दोघां नाठवे दोनीपण । जाले परिपूर्ण श्रीरामें ॥३॥ अग्निसी काष्ठें खेव देती । तींही अग्निरूप स्वयें होती । भरतशत्रुघ्नांची तैसी स्थिती । स्वयें होती श्रीराम ॥४॥ त्यांचें देखोनि आलिंगन । सीता आणि आणि लक्ष्मण । ऐक्यें पडिलें आलिंगन[8] । भिन्नपण दिसेना ॥५॥ भरत आणि शत्रुघ्न । तिहीं वंदितां लक्ष्मण । ऐक्यें पडिलें आलिंगन । भिन्नपण दिसेना ॥६॥ एक पिंडें जन्मले सृष्टीं । त्यांसी खेवा पडीली मिठी । विसरोनियां दुःखकोटी । सुखसंतुष्टी श्रीरामें ॥७॥ जवळी असतां रघुकुळटिळक । पूर्वी हेळणा[9] स्वाभाविक । वियोगसंगमाचें सुख । द्वंद्वदुःख विसरले ॥८॥ नित्य निकट असतां जाण । स्वभावें उपजे हेळण । हेळणासवें दोषगुण । सहजें संपूर्ण देखती ॥९॥

अतिपरिचयादवज्ञा संततगमनादनादरो भवति । मलये भिल्लपुरंधी चंदनतरुकाष्ठमिंधनं कुरुते ॥१८॥

चंदनासभोंवतें समस्त । आरीबोरी चंदन होत । त्यांसी द्विज[10] देव माथां वंदित । घेती श्रीमंत बहु मोलें ॥११०॥ येवढा चंदनीं अति प्रेमा । द्वीपोद्वीपीं अगाध महिमा । त्यांसी भिल्लांगना अति अधमा । आणित अधर्मा कोळसा करूनी ॥११॥ तो मुख्य चंदन मलयाद्रीं[11] । तेथें भिल्लांच्या अधमा नारी । त्यासी जाळोनि अग्निमाझारीं । रांधिती त्यावरी कांजी भाजी ॥१२॥ निकट वासें उबग[12] आला । सुवास हेळसोनि सांडिला । विषय साधावया आपुला । चंदन जाळिला विषयार्थी ॥१३॥ चंदनाचा गुण कैसा । जाळित्याही दे सुवासा । तो नयेचि भिल्लीच्या मानसा । त्याचेनि काष्ठीं शिजवी कांजी ॥१४॥ तैसें साधूपासीं एक आहेती । गुण देखिला तो हेळसिती । मग आपुले विषयस्वार्थी । जाळू जैं धांवती वर्मस्पर्शी ॥१५॥ अहोरात्रीं असोनि संगती । जे साधूचा दोष न देखती । ते ते धन्य त्रिजगतीं । त्यांतें वंदिती शिवशक्र[13] ॥१६॥ साधुसंगती अहर्निश। असोनि न देखती गुणदोष । त्यांपासीं अवतारपुरुष । घ्यावया उपदेश स्वयें येती ॥१७॥ अवतारमूर्ति श्रीवामन । त्यासी कश्यप उपदेशी ज्ञान । अगाध साधूचें महिमान । पूज्य सज्जन तिहीं लोकीं ॥१८॥ याचि

---

शब्दार्थ - १. उल्हासयुक्त मन, २. फुलाबरोबर, ३. गंगेचे उदक, ४. मीठ व उदकाला, ५. आलिंगनाने, ६. विस्तव आणि कापुरास, ७. नाहींसे होऊन, ८. भेट, आलिंगन, ९. हयगय, १०. ब्राह्मण, ११. मलय पर्वतावर, १२. कंटाळा, १३. शंकर, इंद्र वगैरे.

श्रीरामायणाआंत । वसिष्ठापासीं श्रीरघुनाथ । विनीतता[1] उपदेश घेत । साधु संत अति पूज्य ॥१९॥ जावया गुणदोपहेळणासी । वियोग जालिया साधूसीं । त्याचा अनुताप दोष निरसी । पुढें भेटीपासीं स्वानंद ॥१२०॥ राम त्यजोनि मातुळीं भरत । वियोगातुतापें तो सुस्नात । पुढती भेटतांचि श्रीरघुनाथ । सद्यः[2] सुख प्राप्त भरतासी ॥२१॥ वियोगाचा जो संयोग । पापभंगें होय सुखभोग । भरत सुखी जाला सांग । निवालें सर्वांग शत्रुघ्नाचें ॥२२॥ श्रीराम भरत आणि शत्रुघ्न । ऐक्यें पडिलें आलिंगन । खेंवामाजी सुखसंपन्न । स्वानंदघन श्रीराम ॥२३॥ दीप्तीं अनेक दीप लाविती । सकळ दीपीं एकचि दीपीं । भरत शत्रुघ्न ऐशा रीतीं । अभिन्नस्थितीं भिन्न जाले ॥२४॥ जें सुख जालें श्रीरामभेटी । तें सुख बोलतां न ये गोष्टीं । एकाजनार्दनीं पडिली मिठी । सुखसंतुष्टी श्रीराम ॥२५॥ भरतश्रीरामअनुवाद । संवादें ओसंडेल[3] परमानंद । एकाजनार्दनीं निजबोध । कथानुवाद सुखसेव्य[4] ॥२६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामभरतशत्रुघ्नसंयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥ ॥ओंव्या ॥१२६॥ श्लोक ॥१८॥ एवं ॥१३४॥

## अध्याय सोळावा

### श्रीरामांकडून पिंडदानविधी ॥

आघ्राय रामस्तं मूर्ध्नि परिष्वज्य च राघवम् । अंके भरतमारोप्य पर्यपृच्छत सादरम् ॥१॥
क्व नु तेऽभूत्पिता तात यदरण्यं त्वमागतः । नहि त्वं जीवतस्तस्य वनमागतुमर्हसि ॥२॥
किंनु वीर महारण्ये तवागमनकारणम् । कच्चिद्दशरथो राजा कुशली सत्यसंगरः ॥३॥
तात कच्चिच्च कौसल्या सुमित्रा च प्रजावती सुखिनी किच्चदार्या च देवी नंदति कैकयी ॥४॥

श्रीराम भरतास अयोध्येचे कुशल विचारतातः अति प्रीतीं रघुनंदन । भरत आणि शत्रुघ्न । हृदयीं धरिले आलिंगोन । सुखसंपन्न तेणें दोनी ॥१॥ हृदया हृदय एक जालें । तेणें सुखाचें भरतें[5] आलें । दुख निःशेष निमालें । सागर भरिले स्वानंदें ॥२॥ परमानंदें तृप्ति गाढी[6]। द्वंद्वदुःखें देशोधडी । होत हरिखाचिया कोडी । जोडिला जोडी श्रीराम ॥३॥ मग भरतासी रघुनंदन । मस्तकीं करोनि अवघ्राण । अंकीं बैसवोनि जाण । काय आपण पूसत ॥४॥ तुज राज्याचें अभिषिंचन । न व्हावया काय कारण । तेथें पडिलें कोण विघ्न । तेंही संपूर्ण मज सांगें ॥५॥ दशरथ आमुचा पिता । सुखी आहे कीं स्वस्थचित्ता । मज वनवासा निघतां । बहु अवस्था[7] तेणें केली ॥६॥ मज निघतां वनस्थळीं । तूं तेव्हां नव्हतासी जवळी । जळावेगळी मासोळी । तैसी तळमळी मजलागीं ॥७॥ देखोनि रायाच्या दुःखकोटी । मी निघालों उठाउठीं । नाहीं घेतली पुरती भेटी । नाहीं गोष्टी सांगितली ॥८॥ ऐसा राजा दुःखाभिभूत[8] । तूं सांडोनि वना आलासी येथ । हें तंव तुझें गा अनुचित । बुद्धिवंत तूं नव्हेसी ॥९॥ दुःखित राजा स्वयें सांडून । दूरी पंथ अतिक्रमोन । तुम्हि कां दोघे आलेति जाण । तेंही कारण मज सांगा ॥१०॥ एक एकल्यावेगळे नव्हतां जाण । तुम्हीं कां दोघीं घेतलें रान । कां राहिलें राज्याभिषिंचन । तेंही कारण मज सांगा ॥११॥ माझी तुझी सखी माता । आहेत कीं सुखें स्वस्था । सुमित्रा जे पतिव्रता । ते सुखरूपता आहे कीं ॥१२॥ स्वामी वसिष्ठ असतां तेथ । तुम्ही कां आलेति येथ । हा तुमचा निजवृत्तांत । इत्यंभूत मज सांगा ॥१३॥

---

शब्दार्थ - १. नम्रतने, २. तत्काल, ३. आलिंगनात, ४. प्रकाश, ५. भरून येईल, ६. मोठी, ७. आक्रोश, दुःख, ८. दुखानें व्यापिलेला.

**भरत दिङ्मूढ झाल्यामुळे शत्रुघ्नाकडून वृत्त निवेदन :** ऐसें पुसतां रघुनंदन । ऐकतां भरता आलें रुदन । कांही नेदवे प्रतिवचन । मूच्छापन्न तो पडिला ॥१४॥ शत्रुघ्न सांगें दुःखावस्था । आम्ही अयोध्येसी न येतां । तुज वनवासासी जातां । प्राणांतव्यथा रायासी ॥१५॥ सुमंतें आणिला रिता रथ । देखोनि अति दुःखी दशरथ । श्रीरामा तुझी वार्ता पुसत पुसत । पडे मूर्च्छित धरणिये ॥१६॥ श्रीरामीं नव्हेचि गोष्टी भेटी । श्रीराम न देखेचि दृष्टी । श्रीराम आठवितां कंठीं । पडिला सृष्टीं मूर्च्छित ॥१७॥ मूर्च्छेमाजि म्हणे आपण । श्रीरामा दाखवीं कां वदन । श्रीराम स्मरतां संपूर्ण । स्मरणें प्राण सांडिला ॥१८॥ राम नयनीं राम वदनीं । राम मनीं राम ध्यानीं । श्रीराम धरोनि अनुसंधानीं । देह[1] त्यजोनि गेला राव ॥१९॥ तुवां केलें वनप्रयाण । आम्ही जवळी नसतां जाण । करितां श्रीरामस्मरण । रायें प्राण सांडिला ॥२०॥

**रामलक्ष्मण, सीता व सर्वांचा शोक :** ऐसें सांगतां शत्रुघ्न । दुखें मूर्च्छित पडिला पूर्ण । ऐकोनि पितयाचें मरण । मूर्च्छापन्न श्रीराम ॥२१॥ दुःखें सीता रुदनपर । दुःखें मूर्च्छित सौमित्र । चवघेही राजाचे राजपुत्र । जाले पात्र अति दुःखा ॥२२॥ पडतां श्रीरामाचे अश्रुबिंदु । दशरथासी सुखस्वानंदु । श्रीरामासी सुखावबोधु । परमानंदु दशरथा ॥२३॥ श्रीराम सुखरूप स्वतंत्र । करुणारूप उद्धरी पितर । दशरथ सुखी केला साचार । सुखसागर श्रीराम ॥२४॥ श्रीराम जाला सावधान । त्यासी सांगती भरत शत्रुघ्न । आम्हीं केले रायाचें विधान[2] । स्नान पिंडदान तूं करीं ॥२५॥ तुवां करावें शीघ्र स्नान । पिंडदान तिळतर्पण । सपिंडी करोनियां जाण । कर्म पूर्ण करावें ॥२६॥ तुझी आवडी रघुनाथा । अत्यंत होती गा दशरथा । तुझेनि हातें पिंड देतां । सुखरूपता पावेल ॥२७॥ श्रीरामें करितां रुदन । समस्त पितर सनातन[3] । अवघे जाले सुखसंपन्न । हें गुह्यज्ञान कळेना ॥२८॥

**दशरथाची उत्तरक्रिया :** श्रीरामाचें गुह्यज्ञान । नेणती कर्मवादी सज्ञान । त्यासी सांगती कर्मविधान । स्नान पिंडदान करीं श्रीरामा ॥२९॥ अगाधज्ञानी श्रीरघुपती । कर्मी ब्रह्मनिजप्रतीती[4] । कर्मक्रिया जे वेदोक्तीं । ब्रह्मस्थिती प्रतिपाळी ॥३०॥ कर्मीं ब्रह्म ब्रह्मीं कर्म । ऐसें बोलती ते मूर्ख परम । कर्म तेंच निखिल परब्रह्म । ते जाणें वर्म श्रीराम ॥३१॥ श्रीरामें कर्मीं कर्मगती । श्रीरामें कर्मी ब्रह्मस्थिती । श्रीरामें कर्मी नित्यमुक्ती । श्रीराम निश्चितीं परब्रह्म ॥३२॥ ऐसा स्वयें श्रीराम ब्रह्ममूर्ती । तोही स्वधर्म पाळी वेदोक्तीं । ऐकता दशरथनिधनोक्ती । मंदिकिनीप्रति स्नानार्थ आला ॥३३॥ राम लक्ष्मण सीतेसहित । सर्वे शत्रुघ्न आणि भरत । दशरथक्षयविधानार्थ । आले समस्त स्नानासी ॥३४॥ वसिष्ठ अत्यंत निजज्ञाता । तेणें कौसल्यासुमित्रादि श्रीरामाच्या माता । तेथें आणिल्या समस्ता । दुःखस्नानार्था एकत्र ॥३५॥ तिहीं देखतां रघुनाथा । दीर्घ रुदनें आक्रंदतां । श्रीरामा भेटलिया समस्ता । दुःखाभिभूत[5] अति दुःखी ॥३६॥

**कौसल्या वगैरे मातांच्या भेटी :** कौसल्येसी केले नमन । तिणें दिधलें दीर्घ आलिंगन । अश्रुधारा स्रवती नयन । प्रेम संपूर्ण मातेसी ॥३७॥ सुमित्रेचे चरणीं माथा । तितेंहि आलिंगिलें श्रीरघुनाथा । तैसियाचि माता समस्ता । होय वंदिता श्रीराम ॥३८॥ कौसल्येसी नमितां लक्ष्मण । तिणें सप्रेम दिधलें आलिंगन । तुझे केशीं झाडीन चरण । तूं संरक्षण करीं श्रीरामा ॥३९॥ सांडोनियां निजमातापिता । सांडोनि स्वभोग सुंदर कांता । वनीं रक्षिसी श्रीरघुनाथा । दासी सर्वथा मी तुझी ॥४०॥ श्रीरामीं अर्पिसी स्वादिष्ठ फळें । नित्य मस्तकीं वाहसी जळें ।

---

शब्दार्थ - १. अंःकरणवृत्तीमध्ये, २. उत्तरक्रिया, ३. शाश्वत, ४. ब्रह्मानुभव, ५. दुःखाने परिपूर्ण.

काष्ठें पुरविसी प्रबळें । दासी केवळ मी तुझी ॥४१॥ लक्ष्मण म्हणे अवो माते । मी तंव तुझें पोसणें येथें। मज उद्धरिलें श्रीरघुनाथें । पुढती चरणांतें वंदिलें ॥४२॥ सौमित्रें वंदिली सुमित्रा । तिणें आलिंगिलें निजपुत्रा । म्हणे तुवां उद्धरिलें उभय पितरां । श्रीरामचंद्रा सेवोनी ॥४३॥ सौमित्रें निजमाता । स्वयें वंदिल्या समस्ता । कौसल्यें आलिंगिली सीता । पतिव्रता होसी सर्वथा तूं माये ॥४४॥ सीतेनें घातलें लोटांगण । वंदिलें सुमित्रेचे चरण । तिणें दिधलें आलिंगन । आक्रंदें रुदन त्या करिती ॥४५॥ आलिंगिता श्रीरघुनाथा । दुःख विसरल्या निजमाता । देखोनि वल्कलें जटा माथां । अति विस्मिता तटस्थ ॥४६॥ देखतां श्रीरामाचें मुख । विसरोनियां सकळ दुःख । माता पावल्या परम सुख । सुखदायक श्रीराम ॥४७॥ वसिष्ठ म्हणे श्रीरघुनंदना । शीघ्र करोनियां स्नाना । द्यावें दशरथासी पिंडदाना । ज्येष्ठविधान पितृपिय ॥४८॥ चवघे बंधु समस्त माता । सवें घेवोनियां सीता । श्रीराम झाला स्नान करिता । श्रीदशरथा उद्धरावया ॥४९॥

पिंडदान, गयागदाधरदर्शन : श्रीरामें करावया पिंडदान । तिळ तांदूळ यव तूर्ण[1]। भरतें आणिले आपण । ते रघुनंदन न घेची ॥५०॥ मी नाहीं सेवीत अन्न । करितों वनफळांचे भक्षण । त्या फळांचे पिंडदान । करीन आपण पितरार्थ ॥५१॥ मज वनवासाचें दृढव्रत । अन्न हातीं नाहीं स्पर्शित । इंगुदी पुन्नाग अति पवित्र । पिंड पितरार्थ देईन ॥५२॥

स्मृति-यदन्ना : पुरुषा लोके तदन्नास्तस्य देवताः ॥

जे काळीं पुरुषासी जें जें अन्न । तेणें करावें देवतायजन[2] । तेणेंचि पितरांसी पिंडदान । स्मृतिवचन वेदोक्त ॥५३॥ सौमित्रें इंगुदीफळें मर्दून । सीता दे पिंड वळून । श्रीराम करी पिंडदान । कुशास्तरण याम्याग्र[3] ॥५४॥ आणोनियां आरण्य तिळीं । अवघीं दिधल्या तिळांजुळी । तर्पण करितां कृष्णतिळीं । जालें ते काळी अपूर्व ॥५५॥ आब्रह्मादिभुवन । सर्व ऋषि पितृ मानव । ऐसें उच्चारितां राघव । अति अपूर्व तेथें जाले ॥५६॥ पिंड देतां श्रीरघुनाथ । गयागदाधर ओढवी[4] हात । आब्रह्मादि कुळ समस्त । जालें नित्यतृप्त श्रीरघुनाथें ॥५७॥ तुवां देतां तिळोदक । अब्रह्मभुवनींचें लोक । तेहि झाले नित्यमुक्त । परम सुख पावले ॥५८॥ ऐसें बोलोनि उत्तर । अदृश्य जाला गदाधर । वसिष्ठें केला जयजयकार । तारिलें पितर श्रीरामें ॥५९॥ श्रीराम स्वयें आत्माराम । त्याचें कर्म तें परब्रह्म । तो उच्चारी जयाचें नाम । विश्रामधाम तो पावे ॥६०॥ जपतां रामनामोक्ती । चारी पुरुषार्थ पायां लागती । चारी मुक्ती आंदण्या येती । एव्हढी ख्याती नामाची ॥६१॥ श्रीरामाचें वनप्रयाण । करावया दीनोद्धारण । एका विनवी जनार्दन । पितृतर्पण सिद्ध जालें ॥६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां श्रीरामदशरथसपिंडीकरणं नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥ ओंव्या ॥६२॥

## अध्याय सतरावा

### भरताचे समाधान

लक्ष्मणाने बांधलेल्या पर्णशाळेचे सर्वांनी केलेले कौतुक : श्रीरामचंद्राय नमः ॥ श्रीरामें उद्धरिले पितर । ते गगनीं करिती जयजयकार । सुमनीं वर्षती सुरवर । जगदुद्धार श्रीराम ॥१॥ मार्गीं चालतां देखती डोळां । मनोहर पर्णशाळा । सौमित्रें रचिल्या विशाळा । जनकबाळा स्वयें सांगे ॥२॥ तें देखोनि म्हणती माता । धन्य जीवित्व सुमित्रासुता । वनीं सुखरूप श्रीरामसीता ।

शब्दार्थ - १. त्वरित, २. देवांची पूजा, ३. दक्षिण दिशेला टोके करून, ४. पुढे करी.

जाणा तत्वतां याचेनि ॥३॥ याची सेवा अति निर्वाण । श्रीराम चरणीं विकिला प्राण । मस्तकीं जळ वाहे आपण । काष्ठें संपूर्ण हा आणी ॥४॥ श्रीरामसीतेचें चरणक्षाळण । स्वादिष्ठ फळें पुरवी संपूर्ण । नित्य नेमस्त करी आपण । आणि जागरण अहर्निशीं ॥५॥ वनी वसतां श्रीरघुनाथा । येणें विसरविली मातापिता । विसरविली राज्यभोगता । सुख रघुनाथा याचेनि ॥६॥ ऐकोनि लक्ष्मणाची स्थिती । आश्रम देखोनि समस्तीं । पर्णशाळा शोभा देती । विचित्रयुक्तीं मनोहर ॥७॥ सडे चौक रंगमाळा । वृंदावनें सुमनशाळा । आश्रम देखोनियां डोळां । सुख सकळां पैं जालें ॥८॥ वसिष्ठें सुखावोनियां चित्ती । आलिंगिला परम प्रीती। धन्य लक्ष्मणा तुझी भक्ती । श्रीरामाप्रती सद्भावो ॥९॥ लक्ष्मणें स्वयें आपण । वंदिले वसिष्ठाचे चरण । तुझेनि तीर्थे परम पावन । अनन्य भजन श्रीरामीं ॥१०॥ तुझी कृपा अति समर्थ । कृपेनें जोडला श्रीरघुनाथ । ऐसेनि स्वानंदें डुल्लत । आश्रमाआंत बैसले ॥११॥

प्रधान व सर्व सैन्याची श्रीरामांची भेट : ऐकेनिया जयजयकार । प्रधानसेनानीसंभार । भेटावया श्रीरामचंद्र । अवघे सत्वर चालिले ॥१२॥ अश्वगजांचे कडकडाट । रथ चालिले घडघडाट । सेना चालली घनदाट । श्रीराम वसिष्ठ वंदावया ॥१३॥ देखोनि श्रीरामाचें मुख । सुखी जाले एकएक । अयोध्येचे सकळ लोक । परम सुख पावले ॥१४॥ श्रीराम देखतांचि दृष्टी । हरिख न समाये पोटीं । आनंदें ओसंडली सृष्टी । डोळेभेटी होतांचि ॥१५॥ उठोनियां श्रीरघुनंदन । प्रधानादि सकळ जन । त्यांसी दिधलें आलिंगन । आदिकरोन गोरक्षकां ॥१६॥ श्रीरामलागीं आर्तभूत[1] । वना आले उत्कंठित । त्यांसी आलिंगीना रघुनाथ । ऐसा ग्रंथार्थ न मानावा ॥१७॥ श्रीराम सर्वांचा हृदयस्थ । श्रीराम सर्वां हृदयी नित्य व्याप्त । तो दीनांसी न भेटे रघुनाथ । ऐसा ग्रंथार्थ न मानावा ॥१८॥ आश्रम देखोनि समस्त । अतिशयें जालें विश्रांत । वंदोनियां श्रीरघुनाथ । सभा तटस्थ बैसली ॥१९॥

श्रीरामांनी अयोध्येत यावे म्हणून भरताची प्रार्थना : बोलावया कृतकार्यार्थ । कोणाही नव्हे सामर्थ्य । तेथें उठोनियां भरत । श्रीरघुनाथ वंदिला ॥२०॥ भरत म्हणे श्रीरघुनाथा । अयोध्येसी चालिजे आतां । राज्यभार घेवोनियां माथां । आम्हां समस्तां प्रतिपाळीं ॥२१॥ त्वरेनें मज यावया येथ । हेंचि माझें मनोगत । तूं सर्वज्ञ श्रीरघुनाथ । सत्य अनृत जाणसी ॥२२॥

पितृवचनाचा भंग होईल म्हणून श्रीरामांचा भरतास नकार : ऐसें बोलतांचि भरत । हासिंनला श्रीरघुनाथ । म्हणे भाग[2] नेमून गेला दशरथ । तो वचनार्थ पतिपाळीं ॥२३॥ तुज अयोध्येचें राज्याभिषिंचन । मज नेमिलें वनप्रयाण । पितृवाक्य परम प्रमाण । अन्यथा कोण करूं शके ॥२४॥ पित्याचे निजवाक्यें जाण । म्यां केलें वनप्रयाण । तुवां करावें राज्यग्रहण । प्रत्तिपाळणें पितृवाक्य ॥२५॥ जितां पाळिली पित्राज्ञा । मेलिया करूं नये अवज्ञा । विचारीं भरता सर्वज्ञा । तूं पिताज्ञा प्रतिपाळीं ॥२६॥ वेदवचन पितृवचन । जो पाळीना गुरुवचन । त्यासी होय अध:पतन । तैसें आपण न करावें ॥२७॥ पित्राज्ञा मानोनि माथां । राज्य अंगीकारीं गा भरता । तुज मी अभिषिंचितों आतां । आग्रह सर्वथा न करावा ॥२८॥ माझेनि हातें अभिषिंचना। करूं आवडे तुझिया मना । यालागीं आलासी तूं वना । सत्य सर्वज्ञा भरता तूं ॥२९॥

भरताचा श्रीरामांना कळकळीचा आग्रह : ऐकोनि श्रीरामाचें वचन । भरत सांडूं पाहे प्राण । राज्य नव्हे हे महाविघ्न । मज संपूर्ण ओढवलें ॥३०॥ मज वनालागीं येतां । जो तो म्हणे मारूं जातो रघुनाथा । शेखीं[3] श्रीरामही आतां । मजचि भोंवता लागला ॥३१॥ राज्य आलियाचें

---

शब्दार्थ - १. विश्रांतीचे स्थान, २ कार्य, ३. शेवटी

सुख जो मानी तो अति मूर्ख । राज्यलोभाचें महाविख । तें कैकेयीनें देख मज दिधलें ॥३२॥ श्रीरामसेवा सुखसंतुष्टी । सांडोनि राज्यलोभाची दृष्टी । ते अभाग्य जन्मलें सृष्टीं । दुःखकोटी भोगवया ॥३३॥ भरत मारूं जातो रघुनाथा । हे जगीं पावलों अति निंद्यता । वनवासीं आलों शरणार्था । अभिषेकार्था तूं म्हणसी ॥३४॥ तुझेनि हातें राज्यभिषेक । जो वांछी तो अनामिक[1] । अंत्यजांमाजी अंत्यज एक । आत्मघातक महापापी ॥३५॥ तुजवांचोनी रघुनाथा । राज्याभिषेक ज्याचे माथां । तो महापापी तत्वतां । सत्य सर्वथा श्रीरामा ॥३६॥ वृद्धपरंपरा राज्यपट । राज्याभिषेक मुख्य वरिष्ठ । तो कैंवी लाभे कनिष्ठ । विचारीं श्रेष्ठ श्रीरामा ॥३७॥ जो भार शोभे गजा । तो भार वाहतां मी अजा[2] । तेंवी तुझे राज्यीं रघुराजा । अभिषेकितां माझा प्राणांत ॥३८॥ माझा करणें आहे घात । तरी आतांचि अभिषेकावा भरत । तुज देखतां जालिया प्राणांत । पर मुक्त मी होईन ॥३९॥ ऐसें जालिया अभिषेकार्थ । सहज भेटेल श्रीदशरथ । त्यासी हा सांगेन वृत्तांत । अभिषेकीं मृत्य मज आला ॥४०॥

**भरताचा मायेबद्दल युक्तीवाद :** ऐसें तूं म्हणसी आपण । राज्याभिषेकीं पितृवचन । तें मी न मानीं गा प्रमाण । तेंही लक्षण अवधारीं ॥४१॥ तुज वनवास मज राज्यता । वांटे करितां श्रीदशरथा । तेव्हां मीही जवळी नव्हतां । श्रुत सर्वथा मज नाहीं ॥४२॥ जें म्या देखिले ना ऐकिलें । ते मज न वचे राज्य केलें । तूं म्हणसी मायेने दिधलें । तेंही नाथिलें[3] अवधारीं ॥४३॥ मज राज्य दिधलें म्हणसी माया । ते माया मिथ्या गा रघुराया । साच शिवतों तुझिया पायां । मायाकृतकार्या मी करीं ना ॥४४॥ ऐकें मायेचा कृतकार्यार्थ । वना दवडिला श्रीरघुनाथ । जीवें घेतला दशरथ । दुःखी भरत पैं केला ॥४५॥ मायेचें केलें[4] ऐसेंचि घडे । एकपिंडी बंधूंसी वैर पडे । सुने पुत्रा करोनि उघडे । वना रोकडें दवडिलें ॥४६॥ मायेमाजी अति निष्ठुरता । दुःखी केलें श्रीरघुनाथा । चरणचालीं दवडिली सीता । केलें समस्तां अति दुःखी ॥४७॥ अति विपरीत माया मांगी । आपुलें सौभाग्य आपण भंगी । निंद्यत्व पावोनियां जगीं । तरी ते उगी न राहे ॥४८॥ अवघड मायेचें लक्षण । आपणासी आणिलें रांडपण । आपलें करोनि काळें वदन । सखे सज्जन दुःखी केले ॥४९॥ ऐसी माया बाधक भारी । तिच्या निजराज्याची थोरी । मी तरी सर्वथा न करीं । निजनिर्धारीं श्रीरामा ॥५०॥ ऐसें बोलोनि आपण । सवें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले श्रीरामचरण । अश्रु पूर्ण पैं आले ॥५१॥ देखोनि भरताचें लक्षण । श्रीराम बोलिला आपण । दशरथाचें अंतींचें वचन । अन्यथा आपण कदा न करावें ॥५२॥ राम राम करितां स्मरण । रायें मजलागीं दिधला प्राण । तेणें करविलें वनप्रयाण । तें अन्यथा आपण कांही न करीं ॥५३॥ वनवासाचें दृढ व्रत । म्यां घेतलें दशरथादेखत । तें मी अन्यथा न करीं यथार्थ । जाण निश्चित भरता तूं ॥५४॥

**श्रीरामांच्या नकारामुळे भरत आमरणान्त अन्नत्यागासाठी निर्धाराने बसतो :** ऐकोनि श्रीरामाचें वचन । भरतें मांडिलें निर्वाण । देऊं पाहे आपुला प्राण । प्रायोपवेशन[5] करोनियां ॥५५॥

इह तु स्थंडिले शीघ्रं कुशानास्तर सारथे । आर्यं प्रत्युपवेक्ष्यामि यावन्म संप्रसीदति ॥१॥
निराहारो निरालोको धनहीनो यथा द्विजः । यशे पुरस्ताच्छालायां यावन्मां प्रतियास्यति ॥२॥
स तु राममवक्षंतं सुमंत्रं प्रेक्ष्य दुर्मनाः । कुशोत्तरमुपस्थाप्य भूमावेवास्थितः स्वयम् ॥३॥

अयोध्ये नये श्रीरघुनाथ । ऐसा जालासे इत्यर्थ । तेणें दुःखी जाला भरत । प्राणत्यागार्थ सिद्ध जाला ॥५६॥ सुमंतासी सांगे आपण । मंदाकिनीतीर पावन । तेथें करीं कुशास्तरण ।

---

शब्दार्थ – १. महार, २. शेळी, ३. मिथ्या, ४. करणी, ५. मरेपर्यंत अन्नाचा त्याग करून बसणे.

मज निजप्राण त्यागावया ।।५७।। श्रीरामवेगळें राहणे । तें सर्वथा निंद्य जिणें । देह त्यागून रामादेखता मरणें । तरी ब्रह्म पावणें परिपूर्ण ।।५८।। राम न्यावया अयोध्येसी । येथे मी आलों प्रतिज्ञेसीं । राम न पाळी माझिया लाडासी । मी प्राणांसी त्यागीन ।।५९।। सुमंताचें मनोगत । प्राण त्यागूं रिघतां भरत । अयोध्येसी येईल रघुनाथ । येणें लोभें पसरित कुशांतें ।।६०।। ते मी कुशास्तरणीं आपण । नेघें अन्न नेघें जीवन । एकाकी जैसा दीन ब्राह्मण । तैसा जाण पडेन मी ।।६१।। जंववरी कृपा करी ना रघुनाथ । तंववरी मी पडलों असेन येथ । कृपा न करितां निश्चित । तोचि प्राणांत पैं माझा ।।६२।। श्रीरामाचें लळेवाड । रामचि न पुरवी माझें कोड । तैं मज नाहीं देहाची चाड । त्यजून धड निधड[1] होईन ।।६३।। श्रीरामीं प्रेम ज्याचें येथ । रामध्यानें निमालिया नित्यमुक्त । कां परलोक पावलिया तेथ । कृपा दशरथ मज करी ।।६४।। ऐसें श्रीरामादेखतां जाण । भरतें करोनियां शुद्धाचमन । कुशास्तरणीं घालोनि आसन । नेत्र लावोन बैसला ।।६५।। तें देखोनि समस्त । अवघे जाले हाहाभूत । असत्यवादी नव्हे भरत । प्राण निश्चित त्यागील ।।६६।। श्रीरामाचें कृपेंवीण । भरत न वांचे अर्ध क्षण । श्रीरामध्यानीं होवोनि लीन । सांडील प्राण निमेषार्धें ।।६७।। ऐसें देखोनि रघुनाथ । स्वयें भरतासी बोलत । म्हणे तुज हे कर्म अनुचित । नव्हे निश्चित राजधर्म ।।६८।। अंध पंगु कुष्ठशुभ्र[2] । रोगी दुःखी सकामी दुर्धर । देह त्यागिती ऐसे नर । ज्ञानविचार हा नव्हे ।।६९।। भरत म्हणे कृपा न होतां । कैंची आम्हांसी ज्ञानकथा । कोटी अधर्म बैसोंत माथां । परी सर्वथा वाचेना ।।७०।।

श्रीरामांचाही प्रतिज्ञापूर्तीचा वज्र कठोर निर्धार : देखोनि भरताचें निर्वाण । श्रीरामेंही वाहिली आण । वसिष्ठचरणाचें प्रमाण । दंडकारण्य त्यजींना ।।७१।।

लक्ष्मीश्चंद्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् । अतीयात्सागारो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः ।।४।।

पूर्ण चंद्राची जावो शोभा । मेरु पृथ्वीमाजी विरो उभा । सुवर्ण पावो काळिमा प्रभा । तरी व्रतारंभा त्यजींना मी ।।७२।। पश्चिमे उगवो दिनकर । एक होवोत सप्तसागर । आतां प्रळय करो रुद्र । तरी राजोत्तर नुल्लंघीं ।।७३।। दीपाचा पतंग घोट भरू । नभाची मोट बांधो लेंकरूं । रुद्रातें सुखें गिळो उंदिरू । तरी व्रतविचारू त्यागींना ।।७४।। सूर्य अडखळोनि आडीं पडो । मृगजळामाजी मेरू बुडो । मक्षिका पाखीं आकाश उडो । तरी मागें मुरडों मी न शकें ।।७५।। रामें वाहिली निर्वाण आण । भरत कुशास्तरणीं निर्वाण । हाहाकारें गर्जती जन । करिती रुदन अवघेही ।।७६।।

दोघांच्या निर्णयामुळे वंशक्षय होईल म्हणून सर्वांचा आक्रोश : बोंब सुटली एकसरी । आक्रंदें रडती नरनारी । तेथें सावाधांवा[3] कोण करी । वना तरीं आकांत ।।७७।। अयोध्ये न्यावया रघुनाथ । वना उल्हासें आला भरत । प्रतिज्ञापणें दोहींचा अंत । महा अनर्थ ओढवला ।।७८।। बुडाली सूर्यवंशाची कीर्ती । थोर ओढवली[4] अपकीर्ती । येवढी कैकेयीची ख्याती । केली शांती सर्वांची ।।७९।। राजा निमाला रामस्मरणें । रामभरत निमती प्रतिज्ञापणें । प्राण सांडिजे लक्ष्मणें । सीताशत्रुघ्नें निमिजेल ।।८०।। मग येथोनि मागुती । कोण जाईल अयोध्येप्रती । जाली अवघियांची शांती । कैकेयीयुक्ती निजराज्या ।।८१।। भविष्य जाणोनि संपूर्ण । वसिष्ठ न बोले वचन । जनासी अति दुःख दारुण । कोणासी कोण संबोखी[5] ।।८२।। दोघे सत्यवादी संपूर्ण । दोघांचाही दुस्तर पण[6] । त्या दोघां बुझाबी कोण । दुःख दारुण सर्वांसी ।।८३।।

शब्दार्थ - १. मेल्यामुळे, २. पांढरे कोड ज्याचे अंगावर आहे असा, ३. समजूत, ४. प्राप्त झाली, ५. समजावी; कोणाचे कोण सांत्वन करणार? ६. नियम, प्रतिज्ञा.

उपाय न चले नि:शंक । अवघियां पडिलें थोर अटक । तेथें जालें अलोलिक । आला वाल्मीक द्विजवरेंसीं ॥८४॥

अथ तत्र समागम्य वाल्मीकि: सहितद्विज: । भ्रातरौ तो महावीर्यौ काकुत्स्थौ प्रशशंसिरे ॥५॥
धन्यौ युवां राजपुत्रौ धर्मज्ञौ सत्यविक्रमौ । श्रुत्वा वयं हि संभाषामुभयो: स्पृहयामहे ॥६॥

अशा संघर्षाच्या प्रसंगी वाल्मिकींनी येऊन भरताला रहस्य निवेदन केले : श्रीरामभरतापासीं । वाल्मीकी येवोनि वेगेंसीं । बोलता जाला उल्हासेंसीं । म्हणे तुम्ही पुण्यराशी पुण्यपुरुष ॥८५॥ धन्य धन्य दशरथ पिता । धन्य धन्य तुमच्या माता । धन्य धन्य तुमच्या कथा । लोकां समस्तां तारका ॥८६॥ तुमचेनि धैर्यासी धैर्यता । तुमचेनि वीर्यासी वीर्यता । तुमचेनि शौर्यासी शौर्यता । सत्यासी सत्यता तुमचेनि ॥८७॥ धन्य धन्य सूर्यवंशीं । कीर्ति जोडिली वंशानुवंशीं । राज्यलोभ नाहीं दोघांसी । यालागीं भेटीसी मी आलों ॥८८॥ वाल्मीकाश्रम चित्रकूटीं । परी न घेचि श्रीरामभेटी । देखोनि दोघे बंधु संकटीं । आला उठाउठीं समाधाना ॥८९॥ दोघां द्यावया समाधान । वाल्मीक आलासे आपण । जाणोनि अनागतज्ञान[1] । काय वचन बोलिला ॥९०॥ ऐक स्वामी रघुनाथा । अवधारीं धर्मज्ञा तूं भरतां । कांही सांगेन तुमच्या हिता । श्रीरामचरित्रा अति गुह्य ॥९१॥

ततस्त्वृषिगणा: क्षिप्रं दशग्रीववधैषिण: । भरतं राजशार्दूलमित्यूचु: संगता वच ॥७॥
भो भो त्वं व्रतसिद्ध्यर्थ निवर्तस्व इतो:लघु । देवकार्यं हि कर्तव्यं राघवेण महात्मना ॥८॥
एतावदुक्त्वा वचनं गंधर्वा: समहर्षय: । राजर्षश्रीयव तथा सर्वे स्वां स्वां गति गता: ॥९॥

मजसांगातें ऋषिगण । यावया जाण हेंचि कारण । श्रीरामचरित्रगुह्यज्ञान । तुज संपूर्ण सांगावया ॥९२॥ भूत भविष्य वर्तमान । जाणोनि अतिशयेंसी सज्ञान । तें सांगों आले तपोधन । श्रीरामगुह्य सांगावया ॥९३॥ देवऋषीं राजऋषीं । आणि आले तपोनिधि[2] ऋषी । श्रीराम गुह्यज्ञानासी । तुजपासीं सांगावया ॥९४॥ तुम्ही दोघे महाहट्टी । बैसलेति प्राणसंकटीं । हें देखोनि ऋषी कृपादृष्टीं । आले गुह्य गोष्टी सांगावया ॥९५॥ ऐकें भरता सावधान । सीता श्रीराम लक्ष्मण । वनीं बसावया हेंचि कारण । जें श्रीरामें रावण वधावा ॥९६॥ हेचिं देवांचे मनोगत । हेंचि ऋषींचे संमत । रामें वधावा लंकानाथ । हाचि सिद्धांत सर्वांचा ॥९७॥ श्रीरामराज्यासी विघ्न । पडावया हेंचि कारण । तूं हें नेणसी गुह्यज्ञान । प्राणांत दारुण आग्रह करिसी ॥९८॥ अनागत[3] गुह्यज्ञान । सत्य मानीं माझें वचन । आग्रह सांडूनियां आपण । करावें गमन अयोध्येसी ॥९९॥ देवकायार्थालागीं जाण । श्रीराम सीता लक्ष्मण । वनीं ठेवोनि आपण । करावें गमन अयोध्येसी ॥१००॥ ऐसें तूं म्हणसी आपण । कोठें राम कोठें रावण । त्यासी वधावया काय कारण । तेंही कथन अवधारीं ॥१॥ तुंवा केलिया अयोध्यागमन । मागें राम सेवील दंडकारण्य । गंगातीरीं अति पावन । निवासस्थान नासिक ॥२॥ गंगातटीं पंचवटी । वनवासीं पर्णकुटी । श्रीराम लक्ष्मण जगजेठी । सीता गोरटी समवेत ॥३॥ तेरा वर्षे सा मासांवरी । सुखें वनवास श्रीराम करी । अंतींच्या सहा मासांभीतरीं । करील बोहरी[4] श्रीराम राक्षसां ॥४॥ लक्ष्मण देखोनियां दृष्टीं । पुत्रविरोधें छळावयासाठीं । शूर्पणखा वधू गोमटी । कपटें पाटीं बसों येईल ॥५॥ तिसीं नाशिकीं निर्नासिक । सौमित्र करील आवश्यक । तिचे कैवारी त्रिशिरादिक । त्यांसी रघुकुळटिळक वधील ॥६॥ राम लागोनि मृगापाठीं । रावण येवोनि पंचवटीं । सीता चोरोनि गोमटी ।

---

शब्दार्थ – १. भविष्यज्ञान, २. तपश्चर्या हेच ज्याचं धन असे तपस्वी ऋषी, ३. पुढे होणाऱ्या गोष्टीचे गुप्त ज्ञान, ४. नाश.

लंकात्रिकूटीं ठेवील ॥७॥ सीताशुद्धीचे कार्यार्थ । पंपेसी येईल श्रीरघुनाथ । तेथें भेटेल हनुमंत । परम आप्त निजसखा ॥८॥ श्रीरामसुग्रीवां सौजन्य । करील हनुमंत आपण । अमित घेवोनि वानरसैन्य । लंकागमन श्रीरामा ॥९॥ वानर मिळतील महाबळी । समुद्र बांधोनिया शिळीं । लंकेपुढें रणखंदळी । आतर्बळी करील ॥११०॥ एक निजकरें सौमित्र । अनेक वीर मारील चतुर । छेदोनि रावणचें शिर । श्रीरामचंद्र निजविजयी ॥११॥ सोडवील देवांची बांधवडी । तोडील नवग्रहांची बेडी । उभवोनि श्रीरामराज्याची गुढी । येईल तांतडी अयोध्येसी ॥१२॥ वनीं वसतां श्रीरामासी । त्रैलोक्यपावन कीर्ति त्यासी । यालागीं ठेवोनि वनासी । शीघ्र अयोध्येसी तूं जाय ॥१३॥

वाल्मीकींच्या भाषणाने भरताचे समाधान : वाल्मीकाचें ऐकोनि वचन । भरतासी हर्षाचें स्फुरण । सांडोनियां कुशाचें आस्तरण[1] । केले नमन ऋषीसी ।॥१४॥ भरत म्हणे वाल्मीक-मुनी । सुखी जालों मी तुझ्या वचनीं । श्रीराम ठेवानियां वनीं । शीघ्रगमनीं मी जातों ॥१५॥ उल्हास भरताचा देखोन । वाल्मीकें दिधलें आलिंगन । भरतें केलें साष्टांग नमन । सुखसंपन्न तेणें राम ॥१६॥

आह्लादिस्तदा तेन वाक्येन शुभदर्शनः । रामः संहृष्टवदनस्तानृषीनभ्यवादयत् ॥१०॥

वाल्मीके येवोनि आपण । भरतासी दिधलें समाधान । वनवासी रघुनंदन । भरते वचन मानिलें ॥१७॥ तें ऐकोनि रघुनंदन । अत्यंत झाला सुखसंपन्न । एकला आकळी[2] त्रिभुवन । येवढें स्फुरण त्या आलें ॥१८॥

सर्वांना आनंद : सुख दाटलें संपूर्ण । बाहु थरकती उल्हासोन । हरिखे नाचें लक्ष्मण । वाल्मीक संवाद ऐकोनी ॥१९॥ परमानंदे[3] रघुनंदन । केलें वाल्मीकासी नमन । येरें देवोनि आशीर्वचन । केले गमन स्वाश्रमा ॥१२०॥ एकाजनार्दना शरण । ऐकोनि वाल्मीकाचें वचन । भरत पावला समाधान । अयोध्यागमन अवधारा ॥२१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्या-कांडे एकाकारटीकायां भरतसमाधानं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥ ॥ ओंव्या ॥१२१॥

## अध्याय अठरावा

### श्रीरामपादुकांसह भरत अयोध्येत येतो

भरत श्रीरामांची क्षमायाचना करतो : श्रीरामचंद्राय नमः ॥ भरतें धांवोनि आपण । दृढ धरिले श्रीरामचरण । अश्रु चालिले संपूर्ण । तेणें चरणक्षाळण श्रीरामा ॥१॥

स्वस्थगात्रस्तु भरतो वाचा संसज्जमानया । कृताजलिरिदं वाक्यं राघवं पुनरब्रवीत् ॥१॥

स्वेद[4] रोमांच रवरवित । तेणें सर्वांग डवडवीत । हरिखे उत्कंठित जालें चित्त । सद्गदित पैं वाचा ॥२॥ विकळ वाचा होवोनि ठायीं । विनटोनि श्रीरामाच्या पायीं । अंजळिपुट जोडोनि पाहीं । भरत लवलाहीं विनवित ॥३॥ करोनिया कुशास्तरण । तुजवरी देत होतों प्राण । हा माझा अपराध दारुण । क्षमा संपूर्ण करीं स्वामी ॥४॥ भूतीं पृथ्वी नांगरून । दाढी[5] घालोनि करिती दहन । जीवनेंसहित लाताऊन । कर्दमकंदन जन करिती ॥५॥ तो अपराध धरा न मनून । पाळित्या पोळित्या देवोनि दिव्यान्न । जना सुखी करी संपूर्ण । तैसें आपण क्षमा कीजे ॥६॥ श्रीराम आमची जननी । आम्ही तुझीं लेकरें तान्ही । माझा अपराध न मानीं । म्हणोनि लोटांगणी तुज आलों ॥७॥ तुझे वंदोनि चरण । मी करितों अयोध्यागमन । ऐसे बोलोनि करी रुदन । मूर्च्छापन्न तो पडला ॥८॥

शब्दार्थ - १.अंथरुण, २. स्वाधीन ठेवील, ३. आनंदाने, ४. घाम, ५. गवत.

**श्रीराम भरताचे सांत्वन करितात :** भरताचें प्रेम देखोन । कळवळिला श्रीरघुनंदन । धांवोनि उचलिला आपण । समाधान स्वयें वदे ॥९॥ आम्ही तुम्ही चवघे जण । एका पिंडाचे[1] उत्पन्न । कोणाचा अपराध मानी कोण । वृथा उद्विग्न तूं कां होसी ॥१०॥ जीभ रगडलिया दांतांबुडी । कोप आलिया कडाडी । जीभ तोडी दांत पाडीं । तैसा परवडी[2] आम्हां तुम्हां ॥११॥ टाळी पिटतां हातोहात । दुःख वाटे कां सुख होत । तैसें तुम्हां आम्हां येथ । एकात्मता अद्‌भुत आल्हाद ॥१२॥ ऐसें आश्वासून पूर्ण । श्रीरामें दिधलें आलिंगन । म्हणे भरता अयोध्यें करीं गमन । येरें वचन वंदिलें ॥१३॥

**रामाज्ञेने अयोध्येला निघालेला भरत रामविरहामुळे पुढे जाऊ शकत नाही :** श्रीरामाज्ञा अतितांतडीं। भरत निघाला लवडसवडी । पायीं वळलीसे वेंगडी । पडे मुरकुंडी मूर्च्छित ॥१४॥ मन विगुंतलें रामापासीं । नयन विगुतलें रामरूपासीं । पाय ओढिती रामदर्शनासी । गति भरताची खुंटली ॥१५॥ वाचा विगुंतली रामनामासीं । श्रवण विगुंतलें रामकीर्तनासीं । क्रिया विगुंतली रामभक्तीसीं । गति भरताची खुंटली ॥१६॥ प्राण पांगुळला[3] रामापासीं । जीव विनटला श्रीरामासीं । इंद्रियें पारखी[4] जालीं त्यासीं । गति भरताची खुंटली ॥१७॥ श्रीरामाची अनन्यप्रीती[5] । भरताची अगा स्थिती । देखोनि श्रीराम सुखावे चित्तीं । काय त्याप्रती बोलत ॥१८॥ भरता ऐकें गुह्य गोष्टी । माझे प्रेम तुझ्या पोटीं । तेचि पोटीं कैकेयी खोटी । हृदयीं गांठी न धरावी ॥१९॥ मज धाडिलें वनवासासी । सीता पायीं धाडिली वनासी । हें शल्य अहर्निशी । तुझ्या मानसीं सलताहे ॥२०॥ जे हृदयीं माझें पूर्ण प्रेम । तेथें नसावा द्वेष विषम । ऐसें बोलतां श्रीराम । भरत निभ्रम पडे पुढती ॥२१॥

एवं ब्रुवाणं रामं तु वसिष्ठो वाक्यमब्रवीत् । प्रयच्छ पादुके पुत्र भरताय महात्मने ॥२॥
एवमुक्त्वा वसिष्ठेन राघवः प्राङ्मुखः स्थितः । पादुके हेमविकृते मम राज्याय ते ददौ ॥३॥
रामाज्ञां शिरसि स्थाप्य पादुके भरतस्तदा । अयोध्यामेव गच्छामि गृहीत्वा पादुके शुभे ॥४॥

**वसिष्ठांची युक्ती व रामपादुका भरतास अर्पण :** श्रीरामप्रेमें प्रेमळ । रामविरहें अति व्याकुळ । भरत देखोनियां विकळ । तंव वसिष्ठ कृपाळू बोलत ॥२२॥ सांडोनियां श्रीराममूर्ती । भरतासी गमनीं नाही शक्ती । देखोनि गुरु कृपायुक्ती । काय रामाप्रती बोलत ॥२३॥ अति आल्हादें अयोध्येप्रती । भरत जाय शीघ्रगती । ऐसी श्रीरामा आहे युक्ती । ते त्वां निश्चितीं करावी ॥२४॥ तुझ्या पादुका रघुनाथा । ठेवीं भरताचिये माथां । तेणें जाण आल्हादें तत्वतां । अयोध्ये जाता उल्हास ॥२५॥ श्रीराम न घाली पायतन[6] । करावया दीनोद्धारण । तारावया वृक्षवल्लीपाषाण । वनीं विहरण[7] अनवाणी ॥२६॥ रामासी कांटे न रुपती पाहीं । कंटक[8] उद्धरती रामपायीं । अडखळतां ठायींचे ठायीं । पाषाण तेही उद्धरती ॥२७॥ रामपादुका सुवर्णभूषण । आवडीं वागवीं लक्ष्मण । त्याही केल्या भरतार्पण । गुरुवचन वंदोनी ॥२८॥

**कैकेयीला दोष न देण्याविषयी भरताचे आश्वासन :** रामपादुका आलिया हाता। उल्हास भरताच्या चित्ता । पादुका प्रतिष्ठूनि[9] माथां । आल्हादता काय बोले ॥२९॥ श्रीरामपादुका ठेविता माथां । जगीं हारपली द्वेषविषमता । ते मी कैंची आणूं आतां । निजमाता द्वेषावया ॥३०॥ कैकेयीवरदें वनप्रयाण । दूषण नव्हे तें रामा भूषण । वाल्मीकवचनें कळली खूण । आता कोण द्वेषील ॥३१॥ भरत आणि स्वयें शत्रुघ्न । वंदोनि वसिष्ठाचे चरण । करोनि श्रीरामासी नमन । काय आपण बोलत ॥३२॥ तुझ्या पादुका ठेविल्या माथां । तुज भेटल्याविण

---

शब्दार्थ – १. शरीराचे, २. प्रकार, ३. पांगळा झाला, ४. परकीय, ५. एकनिष्ठ प्रीती, ६. खडावा, ७. फिरणे, ८. काटे, ९. ठेवून घेऊन.

रघुनाथा । नाहीं उतरणें सर्वथा । तिन्ही अवस्था त्रिकाळीं ॥३३॥ पादुका माझें निजजीवन । पादुका माझें देवतार्चन । पादुका माझें निजपूजन । नित्य ध्यान चरणांचे ॥३४॥ तुझ्या पादुका जी श्रीरामा । त्या तंव माझा परमात्मा । वर्णूनि पादुकांचा महिमा । वंदोनि श्रीराम निघाला ॥३५॥ जातां घालोनि लोटांगण । भरत काय बोले आपण । वसिष्ठादि रामलक्ष्मण । अवघे जण अवधारा ॥३६॥

नंदिग्रामं गमिष्यामि मातरं भ्रातरं विना । तत्र दुःखमिदं सर्वं सहिष्ये राघवं विना ॥५॥
गतश्चाहो दिवं राजा वनस्थः स गुरुर्मम । रामागमं प्रतीक्षेऽहं पालयिष्यन्वसुन्धराम् ॥६॥

**भरत नंदिग्रामात राहून शत्रुघ्नाकडून राज्यकारभार करवितो :** श्रीरामाचे अनुज्ञेनें[१]। मी करितों अयोध्ये गमन । परी तेथें श्रीरामावांचोन । मी अयोध्याभुवनीं वसेंना ॥३७॥ निजराज्यातें त्यागूनी । पिता प्रवेशे वैकुंठभुवनीं । श्रीरामा सांडोनियां वनीं । मी राजभवनीं राहेना ॥३८॥ विनंती करितों मी समस्तां । मीं नंदिग्रामीं राहीन आतां । अयोध्याराज्यभार तत्वत[२] । होईन चालविता तेथोनी ॥३९॥ भद्रीं[३] न देखतां रघुनाथा । मज नावरे दुःखावस्था । यालागीं अयोध्ये नवजातां । राज्यभार माथां शत्रुघ्ना ॥४०॥ रामेंवीण अयोध्या दृष्टीं । देखतां मज दुःखकोटी । यालागीं तिची न घें भेटी । ते वस्तीची गोष्टी रुचेना ॥४१॥ नंदिग्रामीं करोनि वस्ती । अयोध्येसी निजराज्याची स्थिती । माझिया जाण अनुमतीं । शत्रुघ्नाहातीं करवीन ॥४२॥ श्रीराम पादुकांपुढे जाण । भरत शत्रुघ्न दोघे जण । अयोध्यानिराज्यलक्षण । करिती संपूर्ण पादुका ॥४३॥ पादुकांचा प्रताप पूर्ण । अयोध्येकडे पाहील कोण । कळिकाळ नोळंगती[४] आंगवण[५]। राज्यलक्षण पादुका ॥४४॥ रामपादुका ऐकतां कर्णीं । यम काळ येती लोटांगणी । इंद्रादिक लागती चरणीं । राज्यलक्षणीं पादुका ॥४५॥ पादुकासामर्थ्ये सामर्थ्यता । त्या भाग्यें आलिया माझ्या हाता । त्या म्यां दृढ ओपिल्या माथां । कृपावंता श्रीरामा ॥४६॥ श्रीरामवियोगाचें दुःख । पादुका पावतां गेलें निःशेख । पादुका पाहतां स्वानंदसुख । । आत्यंतिक श्रीरामा ॥४७॥ पुढती भेटे श्रीरघुनाथ । तंववरी माझें हेंचि व्रत । मस्तकीं पादुका सतत । स्वानंदयुक्त वाहीन ॥४८॥ राम राहिला वनवासीं । विसरलों त्या दुःखासी । पादुकारूपें मजपासीं । अहर्निशीं श्रीराम ॥४९॥ तुजसीं वियोग रघुनाथा । येथोनि मज नाहीं आतां । उल्हास भरताचिया चित्ता । स्वानंदता गर्जत ॥५०॥ ऐकोनि भरताचें वचन । श्रीराम झाला सुखसंपन्न । दोघांही दिधलें आलिंगन । भरतशत्रुघ्न सुखरूप ॥५१॥

**चौदा वर्षे चौदा दिवसांनी आपण वनवासातून परत येऊ असे रामवचन :** चौदा वर्षीं चौदा दिवसीं । मी येईन नेमेंसीं । संदेह न धरावा मानसीं । मी तुजपासीं निभ्रांत[६] ॥५२॥ ऐसें बोले श्रीरघुनंदन । यथार्थ मानी भरत शत्रुघ्न । दोन्ही करसंपुष्ट जोडून । साष्टांगी नमन त्याहीं केलें ॥५३॥ बंधुबंधूंस जाला ऐक्यभाव । बंधुबंधूंसीं प्रेम अपूर्व । यालागीं चित्रकूटासी बांधव । ठेविलें नांव श्रीरामें ॥५४॥ चवघां बंधूंसी एकात्मता । चित्रकूटीं आली हाता । यालागीं बांधव हें नाम तत्वतां । स्वभावतां चित्रकूटा ॥५५॥

**निरोप व अयोध्येकडे भरत-शत्रुघ्नांचे प्रयाण :** लागोनी श्रीरामाच्या चरणा । वंदोनि जानकी लक्ष्मणां । तिघां करोनि प्रदक्षिणा । भरतशत्रुघ्नां उल्हासु ॥५६॥ रामपादुका ठेवोनि शिरीं । दोघे बैसले रथावरी । निशाणें त्राहाटिल्या भेरी । निजगजरीं[७] निघाले ॥५७॥ श्रीरामे निजमाता ।

---

शब्दार्थ - १. आज्ञेने, २. खरोखर, ३. सिंहासंत्ती, ४. सेवित नाहीत, ५. शक्ती, ६. निःसंशय, ७. मोठ्या थाटाने.

संबोधिल्या सुखरूपता । त्यांच्या चरणीं ठेवूनि माथा । त्याही समस्ता बोळविल्या ॥५८॥ सैन्य सेनानी प्रधान । तिहीं वंदोनि रघुनंदन । होवोनियां सुखसंपन्न । अयोध्यागमन तिहीं केलें ॥५९॥ निजगजरीं अति उल्हासीं । भरत आला प्रयागासी । भेटोनियां भरद्वाजासी । वृत्तांत त्यापासीं सांगितला ॥६०॥ श्रीरामाच्या निजपादुका । देखोनि भरताचे मस्तकां । भरद्वाज पावला हरिखा । म्हणे धन्य तिहीं लोकीं भरता तूं ॥६१॥ परमानंदें परिपूर्ण । भरता दिधलें आलिंगन । देवोनियां आशीर्वचन । अयोध्ये गमन करविलें ॥६२॥ गंगा उतरोनि झडकरी । गुहकाचे निजनगरीं । भरत आला शृंगवेरपुरीं । गजभारें गर्जत ॥६३॥ रामपादुका देखोनि शिरीं । गुहक लोटांगण करी । भरतचरण वंदोनि शिरीं । हर्षे निर्भर नाचत ॥६४॥ रामपादुका आल्या हाता । त्या तुवां प्रेमें ठेविल्या माथां । धन्य भाग्य तुझे भरता । तूं पढियंता श्रीरामा ॥६५॥ भेटी देवोनि गुहकासी । परम सुख जालें त्यासी । भरत निघाला अयोध्येसी । निजसैन्येसीं सत्वर ॥६६॥ अयोध्या देखोनि भरता । सुख निपजे त्याच्या चित्ता । तेथे माता ठेवोनि समस्ता । होय निघतां नंदिग्रामा ॥६७॥

रथस्थः स तु धर्मात्मा भरतो भ्रातृवत्सलः । पादुके शिरसि स्थाप्य नंदिग्राममुपाविशत् ॥७॥

भरताची नंदिग्रामात राहून रामपादुकांची सेवा : भ्रातृवत्सल भरतवीर । रथीं बैसोनियां शीघ्र । रामपादुकीं मंडित शिर । आला सत्वर नंदिग्रामा ॥६८॥ नंदिग्रामी बाह्यप्रदेशीं । रामपादुका स्थापोनि शिशीं । भरतराजा राजऋषी । जाला तापसी अनुतापें ॥६९॥ नगरीं त्यजोनि समस्त माता । अनुकूल त्यजोनि निजकांता । राजभोगा नातळतां । श्रीरामव्रता अनुसरला ॥७०॥ वनवासीं श्रीरघुनाथ । जें जें व्रत आचरत । तें तें अंगीकारी भरत । तोही श्लोकार्थ अवधारा ॥७१॥

जटावल्कलधारी च मुनिवेषधरः प्रभुः । नंदिग्रामेंऽवसद्वीरः ससैन्यौ भरतस्तदा ॥८॥
सवालव्यजनं छत्रं धारयामास स स्वयम् । रामभक्तः सदा नित्यं रंजयान्विविधा प्रजाः ॥९॥

राज्यवैभव त्यजोनि दूरी । जटावल्कचीरधारी । रामपादुका स्थापोनि शिरीं । जळफळाहारी निर्वाहो ॥७२॥ जंव होय श्रीरामाचें आगमन । तंववरी करणें नाहीं भोजन । दृष्टीं पाहणें नाहीं अन्न । देहवर्तनें जळफळीं ॥७३॥ श्रीरामपादुकांचें भजन । श्रीरामपादुकांचें पूजन । श्रीरामपादुकांचें निजध्यान । स्मरण चिंतन श्रीरामाचें ॥७४॥ रामपादुकीं छत्रधरी । आतपत्र मुक्तझल्लरी । कनकदंड घेवोनि करीं । निरंतरीं ढाळित ॥७५॥ श्रीरामनाम स्मरतां । अराणूक नाहीं भरतां । मेळवोनि साधुसंतां । श्रीरामकथा अनुवादें ॥७६॥ श्रीरामाज्ञा मानोनि माथां । भरत अयोध्ये आला मागुता । त्याच्या पादुका एकाग्रता । होय भजता अति प्रीतीं ॥७७॥ श्रीरामाचें निजवचन । त्यासी सर्वस्वें विकिला प्राण । अयोध्याराज्यसंरक्षण । करी शत्रुघ्न भरताज्ञे ॥७८॥ भरताज्ञे अति सादर । शत्रुघ्न आठही प्रहर । आज्ञाधारी निरंतर । अणुमात्र नुल्लंघी ॥७९॥ बहू तापस अनुष्ठानी । त्यांमाजी भरत महामुनी । विनटलासे श्रीरामभजनीं । अनुदिनीं तन्निष्ठ ॥८०॥

विविधजनसमूहैः संवृतो ग्राम आसीत् प्रतिदिननिशि पूजां पादुकानां च कुर्वन् ।
विविधनृपतिकृत्यं रामपादानुरूपं । विधिवदतिवरेण्यो रामबंधुः कनीयान् ॥१०॥

नंदिग्रामी बाह्यप्रदेशीं । भरत राहिला मुनिवेषेंसीं । तेथें योगी दिगंबर संन्यासी । येती त्यापासीं दूरस्थ ॥८१॥ आले तपोराशी ऋषिगण । आगमी निमगी अति ज्ञान । जपी ध्यानी मुमुक्षुजन । साधु सज्जन तेथें आले ॥८२॥ देशोदेशींच्या प्रजा प्रधान । श्रवणीं श्रद्धाळु बहुत जन । अंजलिसंपुट जोडून । उभा शत्रुघ्न वचनार्थी ॥८३॥ भरतमुखें रामायण । श्रवणें होतसे समाधान । देखोनि पादुकांचे भजन । विस्मित जन अवघेही ॥८४॥ भरताचे नित्ससंगतीं । श्रवण स्मरण अहोरातीं । देखोनि श्रीरामाची भक्ती । सुखी होती समस्त ॥८५॥ श्रीरामपादुका ठेवोनि माथां । भरत अयोध्ये आला असतां । राज्यीं नाहीं अधर्मकथा । अकर्मवार्ता असेना ॥८६॥ कैसी राजाज्ञा समर्थ । प्रजा सत्यवादी समस्त । स्वधर्मकर्मी नित्य रत । श्रीरामभक्त श्रद्धाळु ॥८७॥ राज्यामाजील निजजन । स्वभावेंसीं श्रीरामनामस्मरण । करितां जीविका-वर्तन । रामचिंतन अहर्निशीं ॥८८॥ ऐकोनि भरताचें शीळ । देशादेशींचे भूपाळ । उपायनें घेवोनी प्रबळ । येती सकळ भेटीसी ॥८९॥ रत्नधनगजवाजींसीं । राजे आणिती भेटींसी । भरत नातळे पैं त्यासीं । निजमानसीं निरपेक्ष ॥९०॥ स्मरतां श्रीरामाचें नाम । मावळले क्रोध काम । निघोनि गेला लोभसंभ्रम । भरत निष्काम श्रीरामें ॥९१॥ भेटी परतवोनि समस्त । राजे सन्मानें स्वयें गौरवीत । रामप्रतापें अति विख्यात । उदार भरत तिहीं लोकीं ॥९२॥ श्रीरामस्मरणें प्रज्ञाप्रबुद्ध । श्रीरामाचा कनिष्ठ बंधु । भरत भजनीं अगाधबोधु । वसे स्वानंदु नंदिग्रामीं ॥९३॥ ऐसिया अगाधस्थिती । भरता नंदिग्रामीं वस्ती । वनवासीं श्रीरघुपती । करील ख्याती ते एका ॥९४॥ निजराज्याची लोभप्राप्ती । निःशेष त्यजूनि रघुपती । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥९५॥ सापत्न मातेची वचनोक्ती । श्रीरामें पाळोनि अति प्रीतीं । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥९६॥ देह त्यागितां नृपती । भाक न सांडी श्रीरघुपती । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥९७॥ कौसल्या मातेचिया काकुलती । श्रीरामें मौन धरोनि निश्चितीं । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥९८॥ सीता चरणीं चाले वनाप्रती । दुःख न मानूनि सीतापती । अयोध्याकांडा केली समाप्ती । केली वस्ती वनवासीं ॥९९॥ लक्ष्मणाच्या क्षोभोक्तीं । क्षोभ न मानूनि रघुपती । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥१००॥ भरत नेऊं आला अति प्रीतीसीं । त्यासी बोळवूनि सुखस्थितीं । अयोध्याकांडा केली समाप्ती । करोनि वस्ती वनवासीं ॥१॥ त्यजोनि निजराज्य प्रचंड । वैभवासी देवोनि दंड । नानाभोगांचे ठेवूनि तोंड । अयोध्याकांड संपविलें ॥२॥ दुःख ओढवलें वितंड । तें स्वयें केलें खंडविखंड । मोहाचे करोनि काळे तोंड । अयोध्याकांड संपविलें ॥३॥ अभिमान अति अवघड । भरडिला जैसा मूग कांकड । परिपाकीं करोनि गोड । अयोध्याकांड संपविलें ॥४॥ दुस्तर वन भय दुर्घड । त्या भयांचे ठेचोनि तोंड ।

वनवास करोनियां गोड । अयोध्याकांड संपविलें ॥५॥ याउपरी रघुनंदन । सेवोनि दंडकारण्य । वधील त्रिशिरा खर दूषण । राक्षसदळण श्रीराम ॥६॥ एकाजनार्दना शरण । अगाध कथा रामायण । परमानंदें रसाळ पूर्ण। दंडकारण्यरहिवासु ॥७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अयोध्याकांडे एकाकारटीकायां भरतअयोध्यागमननंदिग्रामवासो नाम अष्टादशोऽध्याय: ॥१८॥ ॥ ओव्या ॥१०७॥ श्लोक ॥१०॥ एवं ॥११७॥

## अयोध्याकांड समाप्तम्

श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## अरण्यकांड

### अध्याय पहिला

॥ श्रीगणाधिपतये नमः ॥

#### श्रीरामांचे दंडकारण्यात गमन

चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् । एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥१॥
कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् । आरुह्य कविताशाखां वंदे वाल्मीकिकोकिलम् ॥२॥

श्रीरामनाम महिमा : श्रीराम चूतवृक्ष[1] प्रबळ । त्यावरी वाल्मीक कवि कोकिळ । नारदवसंतें फुटली कीळ[2] । मधुराक्षरीं सरळ आलापु[3] केला ॥१॥ त्या मधुराक्षरांमाजी मधुर । श्रीरामनाम हें सुखसार । सुखी केलें चराचर । सुखें शंकर डुल्लत ॥२॥ उफराटें राम ये अक्षरी । मरा मरा या उत्तरीं । नारद वाल्मीका उपदेश करी । दों अक्षरीं उद्धरला ॥३॥ नाम शुद्ध हो अथवा अशुद्ध । जो जपे तो पावन शुद्ध । श्रीरामनाम जगद्वंद्य । परमानंद हरिनामें ॥४॥ चोरटा वाल्मीक तरे संसारीं । हेही नामाची कोण थोरी । नाम पावन जगदुद्धारी । नाम उद्धरी महापातक्यां ॥५॥ इतर कवी गज गजरी । वाल्मीक कवि वनगजकेसरी[4] । श्रीरामनामें सिंहनाद करी । रानभरी नवरसां ॥६॥ नवरसांचा रसिक । वनरंगडा रघुकुळटिळक । श्रीरामनामाचा एकैक श्लोक । सुखदायक नवरसां ॥७॥ हास्यादि नवरसवृत्ती । श्रीरामरसें

---

शब्दार्थ - १. आंब्याचे झाड, २. तेज, ३. स्वर, ४. वन्य गजांना सिंह जसा तसा कवींना वाल्मीकी .

त्यांसी सुख प्राप्ती । वाल्मीकनामाच्या नामोक्तीं । पावन होती कविकुळें ॥८॥ श्रीरामनामेंवीण जे तोंड । तें केवळ जाणा चर्मकुंड । भीतरीं जिव्हा चामखंड[१] । कवित्वकाटें काटली ॥९॥ ऐकतां कथा रामायणी । नवरसपापां होय घुणी । नामें उद्धरली कुंटणी । पवित्रवाणी श्रीरामनामें ॥१०॥ श्रीरामकथेची नव्हाळी[२] । शिव वंदी प्रेमसमेळीं । कळा भूतळीं जगद्वंद्य ॥११॥ तें शतकोटी रामायण । येथें आकळूं शके कोण । तेथें अपुरतें[३] मी दीन । कथा जनार्दन स्वयें वदवी ।

भरताचे अयोध्येकडे प्रयाण : करितां लिंगदेहाचें[४] मर्दन[५] । तेंचि जन मानिती अर्दन[६] । यालागीं नांवें श्रीजनार्दन । निजव्याख्यानशास्त्रार्थें ॥१३॥ असो काय काज बहु शास्त्रार्थें । मुख्य श्रीरामकथा येथें । तेंचि श्रवण मनन करावें ग्रंथें । सावध चित्तें अवधारा ॥१४॥ भरत आलिया अयोध्येसी । मागें श्रीराम वनवासीं । काय वर्तलें एके दिवसीं । ते कथेसी अवधरा ॥१५॥

प्रतियाते तु भरते वसन्रामस्तपोवने । लक्षयामास सोद्वेगास्तत्रारण्यनिवासिनः ॥३॥

राममासाद्य निरतांस्तानलक्षयदुत्सुकान् ॥४॥

भरत अयोध्ये गेलियावरी । मागें चित्रकूटवासी ऋषीश्वरीं । अति उद्वेगचित्तेंकरीं । परस्परीं बोलती ॥१६॥

ब्राह्मणांची कुजबूज : ते येवोनि श्रीरामाप्रती । खुणावोनियां कुजबुजती । तें देखोनियां श्रीरघुपती । साशंकित चित्तीं स्वयें जाला ॥१७॥ भरत आला होता सैन्येंसीं । कांहीं उपद्रव जाला ऋषींसीं । किंवा कांहीं मजपासी । अधर्मासी देखिलें ॥१८॥ अथवा लक्ष्मणें यांसी । कांहीं दिधलें अपमानासी । किंवा कांहीं सीतेपासीं । अधर्मासी देखिलें ॥१९॥ ऐसी अति चिंता श्रीरामासी । तंव तें कळों सरलें जाबाली ऋषीसी । तो येवोन श्रीरामापासीं । सत्वरेंसीं बोलत ॥२०॥

कृतांजलिरुवाचेदमृषिर्जाजलिकरस्तदा । अथर्षिर्जरया वृद्धस्तपसा नियतेंद्रियः ॥५॥

चलनं तात वैदेह्यास्तपस्विषु विशेषतः । त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रति वर्तत ॥६॥

जाबाली ऋषींकडून वृत्तांतकथन : जाबाली ऋषि अति वृद्ध । तापसामाजी अति प्रसिद्ध । इंद्रियनेमीं अति अगाध । प्रज्ञाप्रबुद्ध[७] ऋषिवर्य ॥२१॥ ऐसा जो कां ऋषि जाबाली । तेणें करोनियां कृतांजळी । मृदु मधुर वाक्यें मंजुळी । श्रीरामाजवळी बोलत ॥२२॥ श्रीरामापासोनि दुश्चरित । न घडे जागृतिस्वप्नसुषुप्तींत । तुझेनि नामें दुष्कृती तरत । तो तूं सांशकित कां होसी ॥२३॥ तुझेनि मुखचंद्रें चंद्र निष्कळंक । त्या तुझें देखतां श्रीमुख । कोटिजन्मांचे हरे दुःख । परम सुख कोंदाटें[८] ॥२४॥ लक्ष्मणापासोनि अनुचित । मूर्खही सत्य न मानित । तुझिया भक्तापासोनि अकृत्य[९] । न घडे निश्चित श्रीरामा ॥२५॥ निजभक्ताचें अनुचित । तें तूं करिसी अति पुनीत । प्रल्हादें करविला पितृघात । कीर्ति लोकांत अति पावन ॥२६॥ प्रल्हादाचा पितृघात । वंद्य केला त्रैलोक्यात । जे निजमायेचा करिती अंत । ते तें अति आप्त मानिसी ॥२७॥ मातृघात पितृघात । जे जे करिती तुझे भक्त । ते ते मानिसी परम[१०] आप्त । अति पुनीत तिहीं लोकीं ॥२८॥ मातृघातकी परशुराम । पितृघातकी प्रल्हाद परम । या दोघांचे स्मरतां नाम । भेटे श्रीराम स्वानंदें ॥२९॥ प्रल्हाद भक्तमुकुटमणी । पढविला प्रातःस्मरणीं । दुजा ब्रह्मचारिशिरोमणी । वेदीं पुराणीं वानिजे[११] ॥३०॥ यांहूनि सौमित्र परम भक्त । सखा आणि अति पुनीत । यापासोनि अनुचित । न घडे निश्चित श्रीरामा ॥३१॥ सीता तुझी धर्मपत्नी । अयोनिजा जनकनंदिनी । अधर्म तियेपासोनी । जागृतीं स्वप्नीं घडेना ॥३२॥ अधर्माची

शब्दार्थ – १. चामड्याचा तुकडा, २. अपूर्वता, ३. दुर्बल, ४. ज्ञानेंद्रिये, ५. कर्मेंद्रिये, ५.१ प्राण, मन आणि बुद्धी मिळून सूक्ष्मदेह, ५.२ नाश, ६. लाभ, ७, बुद्धिवान्, ८. दाटून जाते, ९. पुण्यवान, १०. वर्णावा, ११. शुक्रशोणितपासून उत्पत्ती नव्हे अशी.

आशंकता । तुम्हांमाजी नाहीं श्रीरघुनाथा । ऋषि बोलती जे वार्ता । ते ऐक आतां सांगेन ॥३३॥ जनस्थानीं वसते जे जन । त्या तापसांचें अति कंदन । राक्षसीं केलें अन्योन्य । तें भय संपूर्ण सांगती ऋषिवर्य ॥३४॥ त्या महाभयाची वार्ता । ऋषि शंकले तुज सांगतां । मजहातीं तुज श्रीरघुनाथा । तिहीं हे कथा सांगविली ॥३५॥ तापसां करीं कोण बाधु । ऐसा पुसती संबंधु । रावणाचा धाकटा बंधु । खर नामें अगाध राक्षस तो ॥३६॥ त्रिशिरा आणि खर दूषण । हे तिघे बंधु सखे जाण । चवदा सहस्र राक्षससैन्य । जनस्थानीं बसविलें ॥३७॥ त्या राक्षसांभेणें[1] भयभीत । तुझा आश्रम करोनि येथ । ऋषी राहिले समस्त । त्या राक्षसां अंत श्रीराम ॥३८॥

राक्षसांच्या युद्धाची भीती : परी आजी आली असे नवी वार्ता । तेणें भय भारी ऋषींतें समस्तां । तुज सांडोनि श्रीरघुनाथा । आणिका पर्वता जाऊं पाहती ॥३९॥ राक्षस खराप्रति सांगत । श्रीरामासवें ऋषी समस्त । राहिले चित्रकूटांत । तो स्वयें येथ येऊं इच्छी ॥४०॥ ससैन्य बंधु तिघे जण । रातोरातीं घाला घालून । मारोनि रामलक्ष्मण । सीता आपण नेऊं पाहती ॥४१॥ सन्मुख यावें तुम्हांप्रती । तंव तुम्ही परमपुरुषार्थी । हा धाक सदा वाहती । तुमची ख्याती कळली असे ॥४२॥ ताटका वधिली एके बाणें । सुबाहु घेतला प्राणें । मारीच उडविला सत्राणें[2] । त्यासीं झुंझणें प्राणांत ॥४३॥ धनुष्यें रावणा लाविली ख्याती । तें मोडिलें घेवोनि हातीं । त्यासीं युद्ध न घडे निश्चितीं । निद्रिस्त रातीं मारावें ॥४४॥ हा राक्षसीं केला इत्यर्थ[3] । तेणें ब्राह्मण चळीं कांपत । तुज सांगावया साशंकित । तें म्यां समस्त श्रुत केलें ॥४५॥ ऐकें श्रीरामा निश्चित । येथें वन आहे अति गुप्त । धाकें ऋषी जाताती समस्त । तुम्हींही तेथें शीघ्र यावें ॥४६॥

बहुमूलफलं चित्रमविदूरादितो वनम् । सबांधव इतो गच्छ यदि चित्तं प्रवर्तते ॥७॥

गुप्तस्थानी जाण्याची सूचना : निकट[4] वन अति गहन । अतर्क्य तर्केना गुप्तस्थान । फळ मूळ गंगाजीवन[5] । विश्रामस्थान वस्तीसी ॥४७॥ तेथें यावें तुम्हीं तिघें जणीं । ऐसें ऋषीश्वरांचे मनीं । तें गुह्य बोलतां कानीं । जालीं तुझ्या मनीं आशंका ॥४८॥ हात जोडोनि समस्तांसी । श्रीराम विनवी ऋषीश्वरांसी । सुखें असावें आश्रमासी । त्या राक्षसांसी मी जाणें ॥४९॥ संरक्षावे गोब्राह्मण । हेचि व्रत स्वधर्माचरण । मी श्रीराम असतां रक्षण । भय तुम्हांलागून पैं नसे ॥५०॥ बाणीं भेदीन मेरुगिरी । मारीन राक्षसांच्या हारी[6] । मी रघुवीर असतां सेवक घरीं । कैसियापरी भय तुम्हां ॥५१॥ ऐसें बोलता श्रीरामासी । विचार करिती अवघे ऋषी । तिन्ही धुरा[7] दळबळेसीं । केंवी दोघांसी आकळती ॥५२॥ एक घेवोनि पळेल सीता । एकला उरेल श्रीराम झुंजतां । समस्त राक्षसांच्या घाता । कैसा साहता तो होय ॥५३॥ सुबाहु मारिला तत्वतां । तैं जवळी नव्हती सीता । दोघे बंधु एकात्मकता । केलें घाता सुबाहूच्या ॥५४॥

राक्षसांच्या प्रचंड सेनेपुढे तिघांचा पाड कसा लागणार : स्त्रियेचे चिंतेकरितां । धैर्य नुरे पुरुषार्थां । जयो सर्वथा न पाविजे ॥५५॥ तीन्ही धुरा भद्रजाती[8] । श्रीराम स्त्रीलोभ हृदयीं असतां । झुंजेल एकला किती । चारी शर निरसोनि जाती । मग पळती माघारे ॥५६॥ हृदयीं स्त्रीलोभ असतां । युद्धीं नुरे एकाग्रता । मंत्रबीज गिळी चिंता । जयो सर्वथा न पाविजे ॥५७॥ हे तिघे वनीं गुप्त होती । मग राक्षस आम्हासीं भक्षिती । याची सांडोनियां संगती । निघा निश्चितीं अवघेही ॥५८॥ युक्ति सांगती श्रीरामाप्रती । तुम्ही दोघे जण पुरुषार्थी । तरी न रहावें येथिले

---

शब्दार्थ – १. राक्षसांच्या भीतीने, २. मोठ्या वेगाने, ३. बेत, ४. जवळ, ५. गंगोदक, समुदाय, ६. धुरंधर, ७. पराक्रमी (खर, दूषण, त्रिशिरा), ८. हत्तीसारखे बलवान.

वस्ती । यावें निश्चितीं आम्हांसवें ॥५९॥ राक्षस धर्मयुद्धी नव्हेती । छळणें पळणें त्यांची शक्ती । सिंतरोनियां[1] नाना युक्तीं । मग मारिती सुरवरांतें ॥६०॥ राक्षस निशाचर होती । येवोनियां रातोरातीं । निदसुरा तुम्हां मारिती । तुमची शक्ति ते काय ॥६१॥ ऐसें बोलतां ऋषीश्वर । राम नेदीच प्रत्युत्तर । ब्राह्मणांमाजी विकल्प थोर । धैर्यनिर्धार असेचिना ॥६२॥ विश्वास नाहीं ब्राह्मणांसी । माझी संगति न घडे यांसी । त्यागोनियां श्रीरामासी । निघाले ऋषी तत्काळ ॥६३॥ रहावया एकरात्री । धीर न धरवे ब्राह्मणांप्रती । त्यागोनियां श्रीरघुपती । अन्यत्रगती निघाले ॥६४॥

श्रीरामांच्या नकारामुळे ब्राह्मणांचे तेथून प्रयाण : अधैर्ये ते कंपायमान । आज्ञा पुसती ब्राह्मण । श्रीरामें करोनियां नमन । म्हणे आपण सुखें जावें ॥६५॥ अविश्वासी द्विजवरें । हातीं स्त्रिया कडिये लेंकरें । माथां घेवोनि यज्ञपात्रें । आश्रमांतरा[2] ऋषी गेले ॥६६॥

सचिंतेषु प्रयातेषु तपस्विषु विशेषतः । विवृद्धं राक्षसं दृष्ट्वा रामोऽपि गमनोत्सुकः ॥८॥

लक्ष्मणोऽपि प्रयातेषु तपस्विषु विशेषतः । न तत्रारोचयद्वासं वैदेही च सुमध्यमा ॥९॥

मग श्रीराम विचारी निजमनीं । राक्षस वाढले जनस्थानीं । तयांच्या बीजनिर्दळणीं । आजि येथोनि निघावें ॥६७॥ सीता म्हणे श्रीरघुनाथा । समस्त ऋषी गेले असतां । येथें राहणें रुचेना आता । आजचि तत्वतां निघावें ॥६८॥ मग बोलिला लक्ष्मण । ऋषीश्वर गेले भयभीतमन । तें भय निर्दळवाया आपण । शीघ्र प्रयाण करावें ॥६९॥ करावें राक्षसनिर्दळण। तेणें श्रीरामा उल्हास पूर्ण । तेणें सर्वांगा आलें स्फुरण । दंडकारण्य शोधावया ॥७०॥ बाहु थरकती समूळीं । पिंजारल्या रोमाबळीं । करावया राक्षसांची होळी[3] । महा आतुर्बळीं[4] श्रीराम ॥७१॥ उल्हास श्रीरामाचे चित्ता । सौमित्रासी होय सांगता । घेवोनियां आयुधां समस्तां । सहितसीता निघे वेगीं ॥७२॥ एकाजनार्दना शरण । चित्रकूटवस्ती त्यागोनि जाण । केलें श्रीरामे प्रयाण । दंडकारण्यप्रवेशा ॥७३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां दंडकारण्यगमनं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥ श्लोक ॥९॥ ओंव्या ॥७३॥

## अध्याय दुसरा

### विराध राक्षसाचा वध

अत्री आश्रमात श्रीरामांचे आगमन : श्रीसीताकांताय नमः ॥ अतिऋषि वसे जेथ । आतुर-विश्रांतिपर्वत[5] । तेथें आला श्रीरघुनाथ । समवेत स्त्रीबंधू ॥१॥ देखोनि अत्रीचे चरण । श्रीरामें घातलें लोटांगण । ऋषीनें दिधलें आलिंगन । समाधान ध्येयध्याना ॥२॥ सीता आणि लक्ष्मण । दोघीं घातलें लोटांगण । दृढ मस्तकीं धरले चरण । सुखसंपन्न ऋषि जाला ॥३॥ श्रीरामें अति उल्हासता । अनसूयाचरणीं ठेविला माथां । अत्रि म्हणे श्रीरघुनाथा । तुझी हे माता पुरातन ॥४॥

अनसूया व सीतेची भेट, सीतेचे अभिनंदन : ऐकोनि अत्रीचें वचन । सौमित्रें वंदिले तिचे चरण । सीतेनें घातलें लोटांगण । दिधलें आलिंगन अनसूये ॥५॥ सीतेसी देखतांचि दृष्टीं । अनसूयेसी सुखानंद पोटीं । धन्य धन्य तूं गोरटी । पतिसन्निष्ठी[6] पतिव्रता ॥६॥ तुझे अंगीं बाळपण । पतिच्या व्रता अनुलक्षून । चरणचालीं वनाभिगमन । तूं संपूर्ण पतिव्रता ॥७॥

---

शब्दार्थ - १. फसवून, २. दुसऱ्या आश्रमाला, ३. समूळ नाश करण्यासाठी, ४. अती बलाढ्य, ५. दुःखितांचे विश्रांतिस्थान, ६. अत्यंत पतिनिष्ठ

पतीचें वचन नुल्लंघिता । जे अनुसरे पतीच्या व्रता । तेचि सती पतिव्रता । ते तूं सीता सभाग्य ॥८॥ ऐसी करोनियां स्तुती । उचलोनियां दोहीं हातीं । आलिंगिली अति प्रीतीं । सतिया[१] सती[१] स्वानंदे ॥९॥ जाणोनि सीतेचें हृद्गत । अनसूयां जाली कृपायुक्त । आपुलें पतिव्रतेचें व्रत । सीतेसी देत स्वानंदें ॥१०॥

सीतेला पतिव्रता व्रत व दिव्यवस्त्र समर्पण : देवोनि पविव्रतेचें व्रत । अनसूया उल्हासयुक्त । दिव्य वस्त्रें अंगरागयुक्त[२] । स्वानंदे देत तें ऐका ॥११॥

अब्रवीच्चापि सकलं हर्षं सीते करोम्यहम् । इदं दिव्यांबरं माल्यं वस्त्रमाभरणानि च ॥१॥

अंगरागं च वैदेहि महार्हं च विलेपनम् । मया दत्तमिदं सीते तव गात्राणि शोभयेत् ॥२॥

अनसूया कृपायुक्त । सीतेसी दिव्य वस्त्रें नेसवीत । आणि दिव्य चंदनें चर्चित । माळा घालित दिव्यसुमनी ॥१२॥ सीतेचे पुरवावया कोड । घातला ताडाचा पैं तोड[३] । अहर्निशीं पडेल उजेड । सरली चाड शशिसूर्यां ॥१३॥ तोडाचिया दिव्यदीप्तीं । शशिसूर्य खद्योत होती । अनसूयेची निजख्याती । पतिसामर्थ्यें पतिव्रता ॥१४॥ जिचा लागतांचि हात । तिन्ही देव जाले अपत्य । तिचें सामर्थ्य अत्यभ्दुत । स्वयें अर्पित सीतेसी ॥१५॥ माझिया दिव्यवस्त्रांची थोरी । मळिन नव्हेती परिचारीं[४] । जाऊ नेणती रजकद्वारीं[५] । निजतेजाकारीं निर्मळ ॥१६॥

उटी व सुमनमालेचे दान : उटी धुतां ओहळेना[६] जाण । देहीं दिव्य चंदनाचें महिमान । करितां अभ्यंगमर्दन । सुगंधपण उडेना ॥१७॥ दिव्य सुमनांची माळा । सुकों नेणे कदाकाळा । नित्य टवटवीत गळां । सुपरिमळा मघमघित ॥१८॥ सीते सावध परिसेयीं । तूं माझा प्रसाद पावलीसी । तुज भय नाहीं राक्षसांपासीं । निःशंक होसी निर्भय ॥१९॥ वियोग जालिया रघुनाथा । वियोग न बाधी तुझिये चित्ता । पूर्वापर पूर्वकथा । होय सांगतां[७] श्रीराम[७] ॥२०॥ म्हणोनि हात ठेविला माथां । अनसूयें अनुग्रहिली[८] सीता । तोचि उपदेश पावोनि तत्वतां । सुखस्वानंदता सीता जाली ॥२१॥ अनसूया महापतिव्रता । पुढें पाहूनियां कार्यार्था । वधावया लंकानाथा । कृपेनें सीता अनुग्रहिली ॥२२॥ श्रीराम सौमित्र सीता । देखोनि उल्हास अत्रीच्या चित्ता । पर्वापार पूर्वकथा । होय सांगता श्रीराम ॥२३॥

अनसूया महाभागा तापसी धर्मचारिणी । दशवर्षसहस्राणि यया तप्तं महातपः ॥३॥

दशवर्षाण्यनावृष्ट्या दग्धे लोके निरंतरम् । यथा मूलफले सृष्टे जान्हवीव प्रवर्तिता ॥४॥

अनसूयेची पूर्वकथा : अनसूया महापतिव्रता । तपस्विनी अति वृद्धता । चंद्रकिरणांसम शोभे माथा । पतिधर्मार्थां अनुकूळ ॥२४॥ न रिघतां गिरिकंदरीं[९] । बैसोनियां घरच्या घरीं । दहा सहस्र वर्षैवरीं । इचिया तपाची थोरी अगाथ ॥२५॥

दहा हजार वर्षे उग्र तपश्चर्या : घरचे घरीं कोण तप । ऐसा पुसावया करिसी संकल्प । ऐक त्या तपाचें स्वरूप । अति निष्पाप सांगेन ॥२६॥ कोणाची न करी असूया । यांलागीं नांवें अनसूया । काम क्रोध लोभ न बाधी जया । तें रघुवर्या महातप ॥२७॥ तपें करकर्शेनि तापस[१०] । कोपें केलें अतिशयें कर्कश । दंडमुंडन वृथा वेष । पडली ओस तपश्चर्या ॥२८॥ काम क्रोध तिसरा लोभ । सांडणे हें तप दुर्लभ । तें घरचे घरी जाले सुलभ । अति निर्लोभ अनसूया ॥२९॥

अनसूया का म्हणतात : जेथें लोभ तेथें असूया । निर्लोभ तेथें अनसूया । याचें नाम तपश्चर्या। जाण[११] रघुवर्या निश्चित ॥३०॥ नुल्लंघणें पतिवचनासी । हें परम तप स्त्रियांसी । तें दहा सहस्र

---

शब्दार्थ - १. पतिव्रतांमध्ये पतिव्रता, २. उटींचे युक्त, ३. अलंकारविशेष, ४. वापरण्याने, ५. परिटाच्या द्वारी, ६. पुसून जात नाही. ७. श्रीरामच, ८. पूर्ण, ९. पर्वताच्या गुहेत, १०. सिद्धी, ११. उपदेशिली,

वर्षे इयेसी । अनसूयेसी फावलें[१] ॥३१॥ उल्लंघितां पतीचें वचन । पतिव्रतांसीं पडिलें खान[२]। नाहीं सामर्थ्य ना समाधान । स्त्रीपुरुष श्वानप्राय वसवसती ॥३२॥ दहासहस्र वर्षेपर्यंत । माझा नुल्लंघी वचनार्थ । तेणें तपें हे समर्थ । ऐक सामर्थ्य इयेचें ॥३३॥

अवर्षणकालात सर्वांचे रक्षण : दहा वर्षे अनावृष्टी । दुर्भिक्ष[३] पडिलें इया सृष्टीं । तृण नाहीं पृथ्वीचे पोटीं । वृथा गोष्टी तेथें कैंचीं ॥३४॥ ते काळीं फळमूळयुक्त । इणें वांचविले जन समस्त । पराङ्मुख[४] नव्हे अहोरात्र । जन संतृप्त फळमूळीं ॥३५॥ गौतम पेरी प्रात:काळीं । मध्यान्हीं आणोनि दे साळी । तेणें पाकें अहल्याबाळीं । ऋषिमंडळी वांचविली ॥३६॥ गौतमें वाचविले ब्राह्मण । इणें वाचविले वर्णावर्ण । पशुपक्षी सूकर[५] श्वान । तृप्तिभोजनें अनुद्वेगें[६] ॥३७॥ जंव जंव मागते येती द्वारासी । तंव तंव उल्हास अनसूयेसी । तृप्ति देतां समस्तांसी । अहर्निशीं उल्हास ॥३८॥ वृक्ष नाहीं पृथ्वीसीं । तरी पुरवी फळमूळांसीं । अगाध सामर्थ्य इयेपासीं । द्विजदेवांसी अतर्क्य ॥३९॥ जेंवी प्रवाहो गंगाजळा । तैसें पुरविले फळमूळां । इचिया सामर्थ्याची कळा । अतर्क्य सकळां द्विजदेवां ॥४०॥

ब्रह्मा, विष्णू, महेश कसोटी घेण्यास येतात : अवर्षणीं तृप्तिभोजन । द्यावें हें इचें व्रत संपूर्ण । एकोनि तिन्ही देव आपण । इचें छळण करूं आले ॥४१॥ ब्राह्मणवेषें याञ्चा करून । इचें घेऊनियां वचन । म्हणती नग्न होवोनि आपण । इच्छाभोजन द्यावें आम्हां ॥४२॥ ऐकोनि त्यांची वनचनोक्ती । शंका नाहीं इचे चित्तीं । हो म्हणत स्वानंदस्थितीं । ऐक रघुपति विनोद ॥४३॥

जलप्रोक्षणाने तिघेही देव बालक झाले : माझें चरणतीर्थ घेवोन । त्यांसी केलें अभिषिंचन । तंव ते तिन्हीं बाळकें जाली जाण । अति अज्ञान षाण्मासिक ॥४४॥ मग होवोनियां नग्न । पायांवरी अभ्यंगून । तिघां देवोनि स्तनपान । करी परियंदण[७] पालखीं[८] ॥४५॥

देव-स्त्रियांची केविलवाणी स्थिती : लक्ष्मी सावित्री पार्वती । तिघी समर्थ्यें विवादती। त्यांसीं दावावया इची स्थिती । तिन्ही मूर्ती छळूं आल्या ॥४६॥ पुढिलासी करूं जातां छळण । छळिताचि छळे आपण । तिन्ही देवां आलें बाळपण । अति अज्ञान स्वये जाले ॥४७॥ दश मासांची अहोराती । अनसूयेनें केली निश्चितीं । तत्काळ तिहींची प्रसूती । अपत्यप्राप्ती पावले ॥४८॥ अतिशयें भोगिती आपत्ती । यालागीं अपत्य म्हणती। स्वविष्ठा स्वयें चिवडिती[९] । ते बाळत्वप्रती तिन्हीं देवा ॥४९॥

देव-स्त्रियांनी अनसूयेची प्रार्थना करून पतिराजांची मुक्तता केली : लक्ष्मी सावित्री पार्वती । देखोनि तिघी कुसमुसती । पति अडकले अनसूयेहातीं । सामर्थ्य तीप्रति चालेना ॥५०॥ जैसे सूर्यापुढें खद्योत[१०] । तैया तिघी जाल्या गर्वहत। अनसूयेसी लोटांगण घालित । पति निर्मुक्त[११] करीं माये ॥५१॥ ती म्हणे पुसावें ऋषीप्रती । त्या मग येती काकुळती । ऋषीराया कृपामूर्ती । पतिनिर्मुक्ति सांगावी ॥५२॥ अनसूया पतिव्रताशिरोरत्न । माझें लाहोनि आज्ञापन[१२] । तिघांचें हारोनि अज्ञान । केले सावधान सुखरूप ॥५३॥ केलें अनसूयेचें स्तवन । तिघे पुत्र जाले जाण । अत्रिगोत्रीं उत्पन्न । ब्रह्मा आपण चंद्र जाला ॥५४॥

दत्तात्रेय अवताराची उत्पत्ती, त्यांचा आशीर्वाद : रुद्र[१३] दुर्वास जाला कोपाग्नी। विष्णू जाला दत्तात्रेय मुनी। ते हे श्रीरामा तुझी जननी। जुनाट जुनी अनसूया ॥५५॥ ते हे तुझी आदिमाता। सत्य मानीं श्रीरघुनाथा। इचे चरणीं ठेवितां माथा । तुम्हां निर्भयता वनवासीं ॥५६॥ अनसूया परम पतिव्रता । इणें अनुग्रहिली सीता । तुम्हासि वनवासीं असतां । भय सर्वथा असेना

शब्दार्थ - १. प्राप्त झाले, २. न्यून, ३. दुष्काळ, ४. पाठदोरी, ५. डुक्कर, खेदरहित अंतकरणाने, ७. झोके देणे, ८. पाळण्यात, ९. कालविती, १०. काजवे, ११. मोकळे, १२. आज्ञा, १३. शंकर.

॥५७॥ ज्या या पावाल भयासी । तेथें तेथें निर्भय तुम्हांसी । ज्या ज्या पावाल अपेशासी । अपेशीं यशी जगद्वंद्य ॥५८॥ तिघें राहोनि त्रिरात्र । फळमूळांचा अति आदर । देखोनि सीतेचा निर्धार । सुख अपार अनसूयेसी ॥५९॥

अत्री ऋषींच्या अनुज्ञेने श्रीराम तेथून पुढे जातात : अभिनंदोनि अत्रिऋषी । नमस्कारोनि अनसूयेसी । श्रीराम निघाला दंडकारण्यासी । राक्षसांसी अंतक ॥६०॥ ऋषिआश्रम वनसमेळीं। अग्निहोत्राची नव्हाळी[1] । पाहतां यागाची शुद्ध शैली । श्रीराम वनस्थळीं विचरत ॥६१॥

भयविव्हल करणारे विराधवन : कोठें त्रिरात्र कोठें पंचरात्र । कोठें वस्ती सप्तरात्र । कोठे राहोनि एकरात्र । गमनीं तत्पर श्रीराम ॥६२॥ तंव पुढें देखिलें दुर्गम वन । पळती गज सिंह व्याघ्र हरिण । ससे साळ्या वृक[2] जंबुकगण[3] । घेवोनि प्राण पळताती ॥६३॥ सिंहें मारावे गजथाट । ते कां पळती एके वाट । व्याघ्र फोडिती हरिणकंठ । ते कां समसगट पळताती ॥६४॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । महद्भय दिसे श्वापदांसी । विसरोनियां वैरभावासी । अति आक्रोशीं पळताती ॥६५॥

विरोधाकडून सीताहरण : यांसी भयाचें काय कारण । ऐसें विचारितां रघुनंदन । तंव विराधें धांवोन । सीता हरण पैं केलें ॥६६॥ पुढें श्रीरामलक्ष्मण । सीता मागें होती आपण । सीतेचें देखोनि सुंदरपण । विराधें हरण तत्काळ केलें ॥६७॥ सीता धरोनि दोहीं हातीं । बैसविली अंकाप्रती । मी होईन तुझा पती । चिंता चित्तीं करूं नको ॥६८॥ तूं अप्सरा कीं खेचरी[4] । वनदेवता कीं सुरेश्वरी । भाग्यें सांपडलीस हो सुंदरी । सुखें माझ्या घरी नांदावें ॥६९॥ तुजसारिखी सुंदर । जरी रिघसील माझे घर । गजमुक्ताफळांचे अलंकार । उत्तम श्रृंगार तुज करीन ॥७०॥ मज जोडली सुंदर कांता । उल्हास राक्षसाचे चित्ता । परी त्यासी शंकेना[5] सीता[5] । श्रीरघुनाथाचेनि बळें ॥७१॥ श्रीरामाच्या बाणांपुढें । विराध राक्षस केवळ बापुडें । मज नेईल कोणीकडे । मरण रोकडें पावेल ॥७२॥ वन अत्यंत गूढ गहन[6] । पुढे गेले श्रीराम लक्ष्मण । त्यांसी विराध न देखे आपण । सीता दोघे जण न देखती ॥७३॥

रामस्मरणाने सीता निर्भय : अनसूयें अनुग्रहिली सीता । तीस भय नाहीं सर्वथा । ते स्मरे श्रीरघुनाथा । पाव कृपावंता श्रीरामा ॥७४॥ ऐकतां श्रीरामस्मरण । राक्षस जाला कंपायमान। म्हणे नको करूं स्मरण । वचन तीक्ष्ण मज बाधी ॥७५॥ ऐसें ऐकोनि सीतेचें वचन । परतले श्रीराम लक्ष्मण । परी गूढ गहन महावन । सीतादर्शन नव्हे त्यासी ॥७६॥ लक्ष्मण कोपला उद्भट । बाण सोडोनि घनदाट । वन छेदोनि केलें सपाट । देखिला पापिष्ठ विराध ॥७७॥

ददर्श गिरिशृंगाभं पुरुषादमवस्थितम् । वक्रनासं विरूपाक्षं विकृतं घोरदर्शनम ॥५॥

लक्ष्मणाकडून अरण्य साफ होताच विराधाचे रामलक्ष्मणांना दर्शन : राक्षस देखिला अति क्रूर । पर्वतोपम महाथोर । वक्र नासिक वक्र वक्त्र । कपाटोदर[7] दुर्धर्ष[8] ॥७८॥ अष्ट महासिंहाचीं मढीं । शूळीं खोंचोनि खांदी कावडी । मृग व्याळ चितळे बापुडीं । मारी कोडी श्वापदांच्या ॥७९॥ सदंत गजांचीं शिरें । गजचर्में थबथबिती रुधिरें । मारोनि पंच पंच व्याघ्रें । खांदी क्रूरें वाहिजेती ॥८०॥ जिव्हा तांबडी लखलखित । नेत्र दिसती अति आरक्त । भूतां करावया अंत । सर्वें[9] धांवत वनासी ॥८१॥

सरामं लक्ष्मणं दृष्ट्वा सीतां च शुभलक्षणाम् । अभ्यधावत्सुसंक्रुद्धो लेलिहान इवांतकः ॥६॥

---

शब्दार्थ - १. नवीनपणा, २. लांडगे, ३. कोल्ह्यांचा समुदाय, ४. आकाशातून गमन करणारी, ५. सीता त्याला डगमगली नाही, ६. खोल, दुर्गम, ७. दरवाजाप्रमाणे मोठ्या हृदयाचा, ८. अजिंक्य, ९.स्वतः

विराधें देखोनि श्रीराम लक्ष्मण । मग सीतेसी पुसे हे दोघे कोण । श्रीराम भर्तार दीर लक्ष्मण । माझी सोडवण करूं आले ॥८२॥ मग तो म्हणे तूं माझी कांता । तुज तंव न सांडीं सर्वथा । या दोघांसी मी भक्षीन आतां । तूं कांहीं चिंता करूं नको ॥८३॥ ऐसें बोलोनिया देख । विकट[1] देवानियां हाक । धांवोनि श्रीरामासन्मुख । काय तो मूर्ख बोलत ॥८४॥

विराधाकडून श्रीरामाचा अधिक्षेप : तुम्हांसवें सुंदर सीता । ते तंव जाली माझी कांता । तुम्हांसी मी न मारी आतां । पळावें जीविता वांचवोनी ॥८५॥ तुम्ही म्हणाल युद्ध करीन । तरी मी क्षणार्धे मारीन । तुमचें रुधिर प्राशीन । मांसभक्षीन स्वानंदें ॥८६॥ अरे मी विराध महाबळी । वसताहें ये वनस्थळीं । तुम्ही दोघे मूर्ख समूळीं । जे भार्यासमेळीं[2] आलेती ॥८७॥ तुम्हां दोघां तापसपण । तरी कां वाहतां धनुष्यबाण । तुम्ही कोठील कोणाचे कोण । हें मज संपूर्ण सांगा ॥८८॥

श्रीरामाचे उत्तर : मग त्यासी सांगे श्रीराम आपण । धनुष्यें गांजिला रावण । तें भंगिलें वाहोनि गुण । तो मी जाण श्रीराम ॥८९॥ सुबाहूचा घेतला प्राण । मारीच उडविला संपूर्ण । ताटिका वधिली निजबाणें । तो मी जाण श्रीराम ॥९०॥ एकवीस वेळी धरित्री । जेणें भार्गवें[3] केली निःक्षत्री । तोही लाजविला शौर्यैंकरी[4] । तो मी निर्धारीं श्रीराम ॥९१॥ सूर्यवंशीचा विख्यात । श्रीराम दाशरथी काकुत्स्थ । करावया राक्षसांचा अंत । वना निश्चित मी आलों ॥९२॥ सीता माझी निजवधू । आणि लक्ष्मण माझा धाकटा बंधू । तूं कोण राक्षससंबंधू । मूळानुवादू मज सांगें ॥९३॥

विराधाची दर्पोक्ती, लक्ष्मणाचे शरसंधान : तंव राक्षस म्हणे श्रीरघुनाथा । जगाद नामें माझा पिता । शतरदा माझी निजमाता । विराध मी तुमच्या घाता करीन ॥९४॥ ऐसें ऐकतां वचन । लक्ष्मण क्षोभला दारुण । धनुर्ष्यी वाहोनियां गुण । तीक्ष्ण बाण सोडिले ॥९५॥ कंकपत्री बर्हपत्री । सुवर्णपुंख[5] चौधारी । भेदले राक्षसाचे जिव्हारी । तेणें तो भारी क्षोभला ॥९६॥ घ्यावया लक्ष्मणाचा प्राण । शूळ सोडिला गर्जोन । श्रीरामें विंधिला बाण । मध्येंच जाण तोडिला ॥९७॥

श्रीरामबाणाने विराध विद्ध : सवेंचि श्रीरामें पैं जाण । विराधासी पाचारून । रुक्मपुंख सोडिला बाण । अति तीक्ष्ण धगधगीत ॥९८॥ विराधा झांपडी पडिली तेणें । मागें पळणें कां पुढें होणें । नाठवे करणें न करणें । येणें जाणें खुंटलें ॥९९॥

विराधाला आत्मबोध : श्रीरामबाणाची लखलख । विराधासी एकाएक । पाडोनि ठेलें जी ठक[6] । क्रिया निःशेष विसरला ॥१००॥ विसरला राक्षसधर्म । विसरला युद्धसंभ्रम । विसरला क्रियाकर्म । घायें निर्भ्रम विराध केला ॥१॥ श्रीरामाचा निजबाण । घेवोनि आला श्रीरामस्मरण । थाकें निमाला देहाभिमान । गर्भबंधन धेवोनी ॥२॥ ऐसी हृदयशुद्धि देखोन । हृदयीं भेदला श्रीरामबाण । बोध पावोनि संपूर्ण । राक्षसें प्राण सोडिला ॥३॥ धन्य श्रीरामाचा बाण । लागतां राक्षसें सोडिला प्राण । बोधा पावला संपूर्ण । तेंचि निरूपण अवधारा ॥४॥

उवाच रामं संहृष्टः प्रांजलिश्शीलतेंद्रियः । कौसल्या सुप्रजास्तात रामस्त्वं विदितो मया ॥७॥
वैदेही च महाभागा लक्ष्मणश्च महारथः । अभिशापादहं घोरां प्रविष्टो राक्षसीं तनुम् ॥८॥

विराधकृत रामस्तुती : बाणें भेदिलें जिव्हार । वाहती रुधिराचे पूर । विकळ पडतां शरीर । हर्षें निर्भर विराध ॥५॥ भेदतां श्रीरामाचा बाण । विकळेंद्रिय चलितप्राण । घायें सुख पावला संपूर्ण । दुःखनिर्दळण श्रीरामबाणें ॥६॥ घाव लागतां व्हावें दुःख । दुःख जावोनि पावला

शब्दार्थ - १. भयंकर, २. पत्नीसह, ३. परशुरामाने, ४. शौर्याने, ५. सोन्याचा पिसारा असलेला बाण, ६. मोह.

सुख । विराला जाला परम हरिख । बाणें अलोलिक सुखी केलें ॥७॥ धन्य धन्य हे श्रीराममूर्ती । धन्य धन्य हे बाणाची सुखशक्ती । धन्य धन्य हे सीता सती । स्पर्शे निर्मुक्ति राक्षसत्वा ॥८॥ लक्ष्मणें कोपोनि उद्भट । घोरारण्य केलें सपाट । माझ्या मोक्षाची ते वाट । केली निर्दुष्ट[1] सौमित्रें ॥९॥ जो कां करी शुद्ध मित्र । त्यासी म्हणती सौमित्र । लक्ष्मण सुमित्र साचार[2] । निशाचर मी सुखी केलों ॥११०॥ मी राक्षस अति अपवित्र । श्रीरामबाणें केलों पवित्र । मज वंदिती सुरनर । सुखी साचार केलों बाणें ॥११॥ बाणीं कैंचा सुखसंभ्रम । बाणीं सुखरूप श्रीराम । बाणीं सबाह्य श्रीराम परम । सुखसंभ्रम तेणें मज ॥१२॥ शापें राक्षसतनु अधम । त्या शापाचें करोनि भस्म । श्रीरामें सुखी केलें परम । निजात्मधाम ठाकावया[3] ॥१३॥ जन्ममरणाचा महाधाक । घायें फोडील नि:शेख । जितां मरतां नाहीं दु:ख । ऐसें निजसुख दिधलें श्रीरामें ॥१४॥ कैंचा शाप तूं येथें कोण । ऐसा श्रीरामें पुसिला प्रश्न । तेही विषयींचें निरूपण । समूळ कथन अवधारीं ॥१५॥

अभिशापादहं घोरां प्रविष्टो राक्षसीं तनुम् । तुंबुरुर्नाम गंधर्व: शप्तो वैश्रवणेन वै ॥९॥
प्रसाद्यमानश्च मया सोऽब्रवीन्मां महायशा: । यदा दाशरथी रामस्त्वां वधिष्यति संयुगे ॥१०॥
तदा प्रकृतिमापन्नोभवान्स्वर्गं गमिष्यति । इति वैश्रवणो राजा रंभासक्तं शशाप ह ॥११॥

पूर्ववृत्तांत, शाप, उ:शाप सांगून विराध गंधर्वलोकी जातो : धनद[4] कुबेर तूं जाणसी । तेणें पाचारिलें गावयासी । मी तुंबरु आसक्त रंभेसीं । मद्यपानेंसीं उन्मत्त ॥१६॥ बळें मज नेलें तेथ । देखोनियां मदगर्वित । तूं राक्षस होसी उन्मत्त । घोर वनांत अघोरा ॥१७॥ शाप ऐकतां अद्भुत । मी जालों भयभीत । लोटांगण घालोनि तेथ । उ:शापार्थ प्रार्थिला ॥१८॥ श्रीराम सीता लक्ष्मण । वनवासा जातां जाण । तूं करिसी सीताहरण । युद्ध दारुण होईल ॥१९॥ लागतां श्रीरामाचा बाण । तूं तत्काळ सांडिसी प्राण । तेव्हा जावोनि शापबंधन । निजात्मभुवन पावसी ॥१२०॥ ऐसी उ:शापाची निजकथा । ते आजि जाली तत्वतां । तुझा बाण लागतां श्रीरघुनाथा । अलौकिकता सुखप्राप्ति ॥२१॥ तुझ्या बाणाची होतां भेटी । अहं कोहं सोहं त्रिपुटी । छेदोनियां उठाउठीं । स्वानंदपुष्टीं सुखी केलें ॥२२॥ लागतांचि तुझा निजबाण । माझें निवटिलें जन्ममरण । शाप बापुडें तें कोण । सुख संपूर्ण पावलों ॥२३॥ जे जाहली सुखप्राप्ती । त्यासी कधीं नव्हे विकृती । कल्पांतीं नव्हेचि च्युती[5] । ऐसी सुखप्राप्ती श्रीरामबाणें ॥२४॥ मज उ:शापें गंधर्वप्राप्ती । गंधर्वदेहीं करितां वस्ती । मज बाधेना देहअहंकृती । ऐसी नित्यमुक्ति श्रीरामबाणें ॥२५॥

विरोधोक्ति –

तव प्रसादामुक्तोऽहमभिशापात्सुदारुणात् । भुवनं स्वं गमिष्यामि स्वस्ति तेऽस्तु महाभुज ॥१२॥
अध्यर्धयोजने तात महर्षि: सूर्यसन्निभ: । इतो वसति धर्मात्मा शरभंग: प्रतापवान् ॥१३॥
तं शीघ्रमभिगच्छ त्वं स ते श्रेयोऽभिधास्यति ॥१४॥

ऐसें बोलोनि आपण । श्रीरामासीं केलें नमन । तंव विराधासी विमान । देदीप्यमान उतरलें ॥२६॥

जातेवेळी विराध श्रीरामांना शरभंग ऋषींच्या आश्रमात जाण्यास सांगतो : राक्षसदेह सांडोनि क्षितीं[6] । विराध बैसतां विमानाप्रती । श्रीरामाचे वसतीची स्थिती । गमनोक्ती सांगत ॥२७॥ येथोनियां अर्धयोजन । शरभंग वसे तपोधन । तपस्तेजें देदीप्यमान । तेथें आपण अवश्य जावें ॥२८॥ तो तुम्हां वनवासाची गती । सांगेल वनवासाची स्थिती । तुझेनि त्यासी निजमुक्ती । जाण निश्चितीं श्रीरामा ॥२९॥

---

शब्दार्थ – १. दोषरहित, २. खरोखर, ३. प्राप्त होण्यासाठी, ४. देवांना धन देणारा, धनाचा स्वामी, ५. स्थानाचा त्याग करावा लागणे, पतन, ६. पृथ्वीवर.

श्रीरामाचे आगमन होणार म्हणून शरभंगाने सत्यलोकाला जाण्याचे नाकारले : इंद्र आला शरभंगापासीं । त्यासी न्यावया सत्यलोकासी । तो राहिलासे तुझे भेटीसी । सत्यलोकासी नवचोनी[1] ॥१३०॥ श्रीराम दंडकारण्या आला । तेणें विराध मारिला । तुझा प्रताप जाणोनि भला । असे राहिला भेटीसी ॥३१॥ श्रीरामाच्या भेटीपुढें । सत्यलोक तें बापुडें । ऐसे ज्ञान त्यासी धडफुडें[2] । भेटीचे चाडें[3] तिष्ठत ॥३२॥ मज सुखी केले राक्षसासी । तैसेचि सुखी करीं शरभंगासी । विराधें सांगोनि श्रीरामासी । पुढती तिघांसी वंदिलें ॥३३॥ मग बैसोनि विमानीं । प्रवेशला निजात्मभुवनीं[4] । श्रीरामचरित्र देखोनी । विस्मित मनीं सुरवर ॥३४॥ मंग करिती जयजयकार । वर्षती सुमनांचे संभार । विराध वधोनि दुर्धर । श्रीरामचंद्र निजविजयी ॥३५॥ विराधाचें घोर वन । तेथें रिघों शके कोण । तोही तारिला विंधोनि बाण । कृपाळु पूर्ण श्रीराम ॥३६॥ एकाजनार्दना शरण । जालें विराधउद्धरण । पुढें शरभंगाचें दर्शन । कथा पावन अवधारा ॥३७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां विराधवधो नाम द्वितीयोऽध्याय: ॥२॥ ओंव्या ॥१३७॥ श्लोक ॥१४॥ एवं ॥१५१॥

## अध्याय तिसरा

॥ श्रीसच्चिदानंदाय नम: ॥

### शरभंगऋषींचा उद्धार

हत्वा त तं भीमबलं विराधं राक्षसं वने । आश्रमं शरभंगस्य राघवौ तौ प्रजग्मतु: ॥१॥
तस्य देवप्रभावस्य तपसा भावितात्मन: । समीपे शरभंगस्य ददर्श महदद्भुतम् ॥२॥

श्रीरामाचे शरभंगाश्रमात आगमन : महाभयानक विराधु । त्याचा क्षणार्धें केला वधु । प्रतापें शोभती दोघें बंधु । परम आल्हादु सीतेसी ॥१॥ मग तिघें जणें वेगेंसीं । निघालीं शरभंग-आश्रमासी । मार्ग क्रमितां दो कोशीं । त्या आश्रमासी देखिलें ॥२॥ तैं शरभंग तपोराशी । तो न्यावया ब्रह्मलोकासी । ब्रह्मयाने धाडिलें इंद्रासी । विमानेंसीं हंसयुक्त ॥३॥

ब्रह्मदेवाचे विमान धाडले : हंसयुक्त विमानेंसी । बैसावया सामर्थ्य नाहीं इंद्रासी । पुढें घालोनि विमानासी । इंद्र रथेंसीं आश्रमा आला ॥४॥ जे विमानीं बैसवेना इंद्रासी । तें विमान धाडिलें शरभंगासी । शरभंगाची निष्ठा कैसी । ब्रह्मयादिकांसी निजपूज्य[5] ॥५॥ इंद्रादिक देव समस्त । येवोनि त्या आश्रमाआंत । अवघे लोटांगणें घालित । मग विनीत शरभंगा ॥६॥ इंद्र प्रार्थी मधुरवचनीं । आम्ही आलों ब्रह्माज्ञेकरोनी । बैसोनि हंसयुक्त विमानीं । ब्रह्मभुवनीं प्रवेशावें ॥७॥ तवं त्यासी शरभंग सांगत । या वना आला श्रीरघुनाथ । विराध वधोनियां निश्चित । आतांच येथ येईल ॥८॥

रामदर्शनापुढे सत्यलोकाची किंमत नाही : न घेतां श्रीरामदर्शन । मज न लगे ब्रह्मसदन । तुम्हीं घेवोनि जावें विमान । मी येईन निजसत्ता ॥९॥ श्रीरामाच्या भेटीपुढें । ब्रह्मभुवन तें कायसें बापुडें । मज तेथें येणें न घडे । ब्रह्मयापुढें सांगावें ॥१०॥ ऐसें शरभंग बोलत । कर जोडोनि इंद्र ऐकत । तंव पातला श्रीरघुनाथ । तोही देखत इंद्रातें ॥११॥

विभ्राजमानं वपुषा सूर्यवैश्वानरप्रभम् । असंस्पृशंतं वसुधां ददर्श विबुधाधिपम् ॥३॥

सोलींव सूर्याची प्रभा । कीं तो अग्नीचा निजगाभा । तैशी इंद्राची अंगप्रभा । निजशोभा

शब्दार्थ - १. न जाता, २. सत्य, प्रत्यक्ष, ३. इच्छेने, ४. आपल्या स्वत:च्या लोकाला, ५. अतिशय पूजनीय.

शोभत ॥१२॥ धरा नातळोनि[1] अधर । रथ शोभे वारु विचित्र । मस्तकीं चंद्रप्रभच्छत्र[2] । युग्मचामर[3] ढळताहे ॥१३॥ देवगण मरुद्गण । इंद्रासवें सिद्ध चारण[4] । सर्वे बृहस्पति गुरु सज्ञान । तिहीं रघुनंदन देखिला ॥१४॥ सीता सौमित्र श्रीरघुनाथ । देखतां अवघे जाले खद्योत[5] । श्रीरामप्रभा अत्यद्भुत । देखोनि विस्मित सुरसिद्ध ॥१५॥ देखतांचि श्रीराघवा । सूर्यप्रकाशीं जैसा दिवा । तैशी दशा आली देवां । देवस्वभावा लाजिले ॥१६॥ तिहीं देखोनि श्रीरघुनाथ । सुख पावले अत्यद्भुत । नभीं जयजयकार करित । निघाले समस्त निजधामा ॥१७॥ शरभंग सांगे देवांप्रती । ब्रह्मसदनीं पुनरावृत्ती । श्रीरामदर्शनें अक्षयप्राप्ती । तेंही ब्रह्मयाप्रति पुसा तुम्ही ॥१८॥ श्रीराम देखतांचि दिठी । जन्ममरणा होय तुटी । खुंटली पुनरावृत्तीची गोठी । ऐसी सुखभेटी श्रीरामीं ॥१९॥ इंद्रादि देवां उपेक्षून । ओसंडोनि ब्रह्मसदन । घ्यावया श्रीरामदर्शन । अति सज्ञान शरभंग ॥२०॥

**श्रीरामांनी शरभंगांचे दर्शन घेतले :** ऐकोनि ऋषींचें वचन । इंद्रादि देव गेले निघोन । आश्रमा आला रघुनंदन । केले नमन शरभंगासी ॥२१॥

तस्य पादौ च संगृह्य रामः सीता च लक्ष्मणः । निषेदुस्तदनुज्ञाता लब्धवासा निमंत्रिताः ॥४॥

श्रीरामें वंदिलें ऋषीचे चरण । सीता आणि लक्ष्मण । दोघी घातलें लोटांगण । मस्तकीं चरण वंदिले ॥२२॥ ऋषीने दिधलें अलिंगन । मधुपर्कविधीनें[6] पूजन । पूजोनियां श्रीरघुनंदन । सावधान बैसले ॥२३॥

ततः शक्रोपयानं तु पर्यपृच्छत राघवः । शरभंगस्तु तत्सर्वं राघवाय न्यवेदयत् ॥५॥
अहं ज्ञात्वा नरश्रेष्ठ वर्तमानमदूरतः । ब्रह्मलोकं न गच्छामि त्वामदृष्ट्वा प्रियातिथिम् ॥६॥
अक्षया नरशार्दूल जिता लोका मया शुभाः । ब्रह्मचाश्च नाकपृष्ठ्याश्च प्रतिगृह्णीष्व मामकान् ॥७॥

**शरभंगाकडून स्ववृत्त कथन :** श्रीराम पुसे ऋषीप्रती । इंद्रादिक देवपंक्तीं । आले होते आश्रमाप्रती । कोणे अर्थीं ऋषिवर्या ॥२४॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । शरभंग विस्मयापन्न । न करितां जप तप ध्यान । दिव्यदर्शन श्रीराम देखे ॥२५॥ दिव्यचक्षु श्रीरामाचे पोटीं । श्रीराम देखे अखिल सृष्टी । श्रीरामें दाटुगी[7] ब्रह्मदृष्टी । देखोनियां पोटीं श्रीराम ॥२६॥ वेदशास्त्रांचे निजवर्म । श्रीराम केवळ परब्रह्म । दीन तारावया वनोद्रम । विश्रामधाम श्रीराम ॥२७॥ ऐसी श्रीरामाची कीर्ती । ते मज आली अति प्रतीती । ऋषि आपुली धर्मस्थिती । श्रीरामप्रती सांगत ॥२८॥ म्यां साधिली जे जे प्राप्ती । अति दुस्तर ते जनांप्रती । त्या त्या धर्माची निजस्थिती । यथानिगुती सांगेन ॥२९॥ साङ्ग अविकाळ कर्में देख । म्यां आसाधिला[8] पितृलोक । त्याचें न मानेच सुख । तो म्यां निःशेख त्यागिला ॥३०॥ करोनि शत सोमयाग । म्यां साधिला स्वर्गभोग । तंव तो वाटे क्षयरोग । तोही म्यां साङ्ग उपेक्षिला ॥३१॥ महर्लोक जनलोक । आदिकरोनि तपोलोक । साधिल्या मज नव्हेचि सुख । ते म्यां निःशेख त्यागिले ॥३२॥ ब्राह्मणभक्ति सत्वव्रत । तेणें सत्यलोक प्राप्त । इंद्रादिदेव समस्त । मज न्यावया येथ स्वयें आलें ॥३३॥ हंसयुक्त निजविमान । स्वयें धाडी चतुरानन । परी तुझें देखोनि आगमन । म्यां ब्रह्मसदन त्यागिलें ॥३४॥ लोकलोकांतर[9] प्राप्त । ऐसें पुण्य केलें अद्भुत । परी तें तुज अर्पिलें समस्त । श्रीरघुनाथ प्रीति पावो ॥३५॥ कर्म न करितां ब्रह्मार्पण । तरी तें वाढवी जन्ममरण । तुझे देखतां निजचरण । श्रीरामार्पण सर्व कर्में ॥३६॥ मज पूर्वी होती भ्रांती । जे पुण्यें होय ब्रह्मप्राप्ती । पुण्यपापक्षयाअंतीं । श्रीराममूर्ती तैं भेटे ॥३७॥

---

शब्दार्थ - १. न स्पर्शून, २. चंद्रकांतीप्रमाणे शोभणारे छत्र, ३. दोन चवऱ्या, ४. भाट, ५. दृष्टीने, ६. अतिथीची मध, धृत, दही, गंधपुष्पादिकांनी पादप्रक्षालनपूर्वक पूजा, ७. विशाल, ८. मिळविला, ९ इहलोक आणि परलोक.

लोकलोकांतरपुण्यें देख । न तुटे दुःख नव्हेचि सुख । तुझें देखतांचि श्रीमुख । अलोलिक सुखप्राप्ति ॥३८॥ साच श्रीराम देखिल्या दृष्टीं । समूळ संसारासी होय तुटी । निष्काम पुण्याच्या कोटी । तैं तुझी भेटी श्रीरामा ॥३९॥ तुझे भेटीलागीं जाण । सांडिलें सत्यलोकगमन । जालिया श्रीरामदर्शन । समाधान जीवशिवां ॥४०॥

**श्रीरामांना सुतीक्ष्णऋषीकडे जाण्याची शरभगांची सूचना :** देखतां श्रीराममूर्ति । सर्वेंद्रियांनित्य विश्रांति । हे तंव माझी निजप्रतीति । सत्य निश्चितीं श्रीरामा ॥४१॥ ऐसी ऐकोनि ऋषिवचनोकित । संतोषला श्रीरघुपति । ऋषीची देखोनि अद्‌भुत शक्ति । स्वयें त्याप्रती पूसत ॥४२॥ दंडकारण्य महावन । ये वनवासीं निवासस्थान । कोठें म्यां करावें आपण । आज्ञापन मज देईं ॥४३॥

**शरभंग उवाच–**

सुतीक्ष्णमभिगच्छ त्वं राम शीघ्रं तपस्विनम् । रमणीये वनोद्देशे स ते वासं विधास्यति ॥८॥

शरभंग म्हणे श्रीरामासी । येचि वनीं वनवासीं । सुतीक्ष्ण वसे महाऋषी । शीघ्र त्यापासीं तुम्ही जावें ॥४४॥ तो तुम्हासीं वनवासीं वस्ती । सांगेल पैं यथास्थिती । जेणें वासें श्रीरामकीर्ती । यश त्रिजगतीं वाढेल ॥४५॥

एष पंथा महाप्राज्ञ मुहूर्तं स्थीयतामिह । यावज्जहामि गात्राणि जीर्णां त्वचामिवोरगः ॥९॥

**शरभंग ऋषी श्रीरामांसमोर आत्मदहन करून सत्यलोकाला जातात :** येणेंचि पंथें महाप्राज्ञा । जावें सुतीक्ष्णऋषिदर्शना । परी कांहींएक असे विज्ञापना । ऐकें सर्वज्ञा श्रीरामा ॥४६॥ तुझें देखतांचि चरण । दृश्य द्रष्टा नाहीं दर्शन । खुंटलें भवभयाचें भान । गमनागमन मज नाहीं ॥४७॥ तरी प्रारब्ध बळी ये सृष्टीं । अनिर्वाच्य[१] त्याची गोष्टी । तें मज येथें दाटोवाटी । नेतें उठाउठी सत्यलोकां ॥४८॥ माझे अदृष्ट[२] देखानें । ब्रह्मयानें धाडिलें विमान । तें म्यां निवारिलें जाण । तुझें दर्शन घ्यावया ॥४९॥ तुजसीं जंव हाय भेटी । तंव प्रारब्धदेहाची गांठी । तुज देखतां जगजेठी । उठाउठीं देह पडेल ॥५०॥ तुज देखतां सावधान । करूनि निजदेहाचें दहन । करीन सत्यलोका गमन । तंव आपण स्थिर व्हावें ॥५१॥ क्षणैक राहावें रघुपति । सर्प सांडी जैसी कांति । तैसी स्थूळ देहाची निवृत्ति । करीन निश्चितीं श्रीरामा ॥५२॥ स्थूल देह होती जाती । परी पालटेना आत्मस्थिती । मग योगाग्नीं दाहोनि देहाकृती । जाईन निश्चितीं सत्यलोका ॥५३॥ तुझिया कृपें श्रीरघुनाथा । भय नाहीं जन्म धरितां । भय नाहीं कर्म करितां । देह मरतां भय नाहीं ॥५४॥ दोराअंगीं सर्प जन्मला । नांदोनियां स्वयें निमाला । त्यासी दोर नाहीं भ्याला । तैसा जाला देहसंग ॥५५॥ जैसी देहासवें मिथ्या छाया । तैसी मुक्तांसवें मिथ्या काया । राहिलीसे श्रीरघुराया । भोगावया अदृष्ट ॥५६॥ ऐसें बोलोनियां जाण । श्रीरामादेखतां आपण । शरभंगानें घालोनि आसन । केलें दहन योगाग्नियोगें ॥५७॥

स च पावकसंकाशः कुमारः समपद्यत । उत्थायाग्निचयात्तस्माच्छरभंगो व्यरोचत ॥१०॥

करितां योगाग्नीं देहदहन । सत्यलोक भोगायतन । कुमारदेह पावला आपण । देदीप्यमान तेजस्वी ॥५८॥

**सत्यलोकमहिमा :** याज्ञिक साधिती स्वर्गभुवन । त्याहून याचें महत्त्व गहन । अश्वमेध राजसूययज्ञ । त्याहून गहन महिमा याची ॥५९॥ क्रमोनियां पितृस्थान । क्रमोनि स्वर्ग महर्जन । क्रमोनियां देवसदन । विरामजमान सत्यलोकी ॥६०॥ सत्यलोकीं शरभंगासी । श्रीरामकृपा फळली कैसी । तेथेंही देहबुद्धि नाहीं त्यासी । पूज्य सर्वांसी जरी जाला ॥६१॥ ब्रह्मयानें सन्मानितां त्यासी । श्लाघ्यता न धरी देहबुद्धीसी । श्रीरामकृपा फळली ऐसी । भोगी प्रारब्धासी विदेहत्वें ॥६२॥ करितां श्रीरामनास्मरण । बाधूं न शके देहबंधन । ते देखिलिया

---

**शब्दार्थ**.– १. वाणीने वर्णन करण्यास अवघड, २. प्रारब्ध

श्रीरामचरण। देहीं विदेही आपण शरभंग ॥६३॥ दीन तारावया जाण । श्रीरामाचें वनप्रयाण । एकाजनार्दना शरण । जगदुद्धारण श्रीराम ॥६४॥ विदेहकैवल्याचें ताट । शरभंगासी केलें चोखट । सेवितां देशभाषा उच्छिष्ट । जालों अवचट शेषभागी ॥६५॥ परमामृत रामायण । तेथें भोक्ते वसिष्ठ वाल्मीक पूर्ण। त्यांचें उच्छिष्ट सेविता जाण । एकाजनार्दन विदेही ॥६६॥ इति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां शरभंगोद्धरणं नाम तृतीयोध्याय: ॥३॥ ओंव्या ॥६६॥ श्लोक ॥१०॥ एवं ॥७६॥

## अध्याय चौथा

॥ श्रीसीतापतये नम: ॥

### मंदकर्णी ऋषींचा उद्धार

शरभंगे दिवं प्राप्ते मुनिसंघा: समंतत: । अभ्यगच्छंत ककुत्स्थं रामं ज्वलिततेजसम् ॥१॥

**ब्राह्मण आश्रयार्थ श्रीरामांकडे येतात :** विराध वधिला अति दारुण । केलें शरभंगोद्धरण । तें देखोनि मुनिगण। आले ठाकून श्रीरामा ॥१॥ वैखानस[1] वालखिल्य[2]। अग्निहोत्री शुद्धशीळ। राक्षसभयें अति व्याकुळ । आले सकळ श्रीरामापासीं ॥२॥ जळाहारी फळाहारी । जटाधारी ब्रह्मचारी । पत्राहारी वायुआहारी । निरहारी ऋषी आले ॥३॥ एक भगवे एक नागवे । वल्कलधारी मळिन लेवे[3]। राक्षसभयें आले आघवे । आम्हां राघवें रक्षावें ॥४॥ एकांगुष्ठव्रत एकांसी । एक ते वृक्षाग्रनिवासी । एक ते एकपाद तापसी । भयें संन्यासी येवों सरले ॥५॥ जळवासी आकाशवासी । विवरवासी अहर्निशीं । एक ते सदा शमशानवासी । तेही धाकेंसीं येवों सरले ॥६॥ राक्षसधाकाची धुकधुक । सपत्नीक अपत्नीक । विधुर आले पैं अनेक । रघुकुळटिळक संरक्षी ॥७॥ वृक्षवृद्धें श्रीरामाप्रती । अतिशयें येती काकुळती । राक्षसमहामार अती । आम्हां रघुपती रक्षावें ॥८॥ एक बोचरें[4] उखळें हातीं । फळें ठेंचठेंचोनि खाती । तेही आले श्रीरामाप्रती । राक्षयभयें महाभीत ॥९॥ ज्ञानी ध्यानी समाधानी । राक्षसभयें भिवोनी । आले श्रीरामा ठाकोनि । अवघे मुनी एकत्र ॥१०॥

एवं वयं न मृष्यामो विप्रकारं तपस्विनाम् । क्रियमाणं वने घोरं रक्षोभिर्भीकर्मभि: ॥२॥

ततस्त्वां शरणार्थं च शरण्यं समुपस्थिता : । परिपालय नो राम वध्यमानान्निशाचरै: ॥३॥

**ब्रह्मवृंदाची गाऱ्हाणी :** सांगती राक्षसांच्या कडोविकडी[5] । मारिल्या तापसांच्या कोडी। मांस खावोनि सांडिली मढीं । लोळती बापुडीं असंस्कारें ॥११॥ जे संस्कार करूं जान्ती । त्यांसी राक्षस येवोनि खाती । ऐसीं मढीं नेणों किती । लोळती क्षितीं श्रीरामा ॥१२॥ आम्ही आलों तुजपासीं । राक्षसीं बहुत केली कासाविसी । शरण आलों तुझ्या चरणांसी । आतां संरक्षीं श्रीरामा ॥१३॥ आम्हांसी रक्षिता नाहीं कोणी । दैवें आलासी तूं धनुष्यपाणी । आम्ही घालितों लोटांगणी । आमच्या रक्षणीं सज्ज[6] होई ॥१४॥ आम्ही तुझे शरणागत । शरण आलों गा समस्त । तूं कृपाळु श्रीरघुनाथ । दीननाथें अनाथ रक्षावे ॥१५॥ आम्ही केवळ गोब्राह्मण । काया वाचा मनसा शरण । आमचें करावें संरक्षण । अवघे जण प्रार्थिती ॥१६॥

---

शब्दार्थ - १. वानप्रस्थ-तृतीयाश्रमी जन, २. पार्वतीविवाहसमयी तिला पाहून ब्रह्मदेवांचे वीर्य पतन पावले त्यापासून अंगुष्ठप्रमाण साठ हजार ऋषी झाले ते, ३. वेष, ४. दात पडलेले, ५. पराक्रम, ६. तयार.

श्रीरामांचे विनम्र उत्तर : ऐसें ब्राह्मणाचें दीन भाषण । ऐकोनियां श्रीरघुनंदन । कळवळोनियां संपूर्ण । काय आपण बोलत ॥१७॥

रामस्तेषां वचः श्रुत्वा तापसानां तपस्विनाम् । इदं प्रोवाच धर्मात्मा सर्वानेव तपस्विनः ॥४॥
नैवमर्हथ मां वक्तुमहमेवं सलक्ष्मणः । तपोवृद्धान्वयोवृद्धान्शरण्यान्शरणागतः ॥५॥
भवतामर्थसिध्यर्थमागतोऽहं यदृच्छया । तस्य मेऽयं वने वासो भविष्यति महाफलः ॥६॥
तपस्विनां रणे शत्रून्हन्तुमिच्छामि राक्षसान् । पश्यंतु वीर्यमृषयः सभ्रातुर्मे तपोधनः ॥७॥

श्रीराम म्हणे मी किंकर[1] कोण । नव्हे तुमच्या दासासमान । त्या मज म्हणा आलों शरण । हें नव्हे वचन तुम्हां योग्य ॥१८॥ तुम्ही वयोवृद्ध तपोवृद्ध । सज्ञान ज्ञानी अति प्रबुद्ध[2] । ज्येष्ठ श्रेष्ठ महासिद्ध । सन्मानवाद[3] न वदावा ॥१९॥ तुम्हांपासूनि घ्यावा मान । तेंचि आम्हांसी विषप्राशन । तुम्ही माझें देवतार्चन । साधुसज्जन मज पूज्य ॥२०॥ आमुचा धर्म द्विजरक्षण[4] । वना आलों याचि कारण । खरदूषणनिर्दळण । संरक्षण साधूंसी ॥२१॥ तुमचे आशीर्वादजोडीं । रणांगणीं निजपरवडीं[5] । मारीन राक्षसांच्या कोडी । अर्धघडी न लागतां ॥२२॥ ऐसी ऐकोनि श्रीरामवाणी । जयजयकार केला ब्राह्मणीं । हर्ष पावोनि मुनिगणीं । आशीर्वचनी अभिषेक ॥२३॥

स राघवः सह भ्रात्रा वैदेह्या च परंतपः । सुतीक्ष्णस्याश्रमपदं जगाम सहितो द्विजैः ॥८॥

सीता लक्ष्मण रघुनाथ । सांगातें मुनिगण समस्त । शरभंगानें धाडिले जेथ । त्या आश्रमा जात सुतीक्ष्णाच्या ॥२४॥

सर्वजण सुतीक्ष्ण ऋषींच्या आश्रमी जातात : सुतीक्ष्ण ऋषि महाश्रेष्ठ । तपस्तेजें अति तेजिष्ठ त्याचा आश्रम सुखोद्दिष्ट[6] । दुःखसंकट असेना ॥२५॥ नवल आश्रमाची लीला । सुवास सुस्वाद फळमूळां । आचमन करितां तेथींच्या जळा । भ्रमा सकळा निवारी ॥२६॥ आश्रमा येतांचि देख । अवघ्यां आलें परम सुख । सुखावोनि रघुकुळटिळक । ऋषिसन्मुख तो आला ॥२७॥

श्रीरामांचे स्वागत : आला देखोनि रघुनंदन । ऋषीनें सांडिलें आसन । सांडोनियां जप ध्यान । अति सावधान भेटीसी ॥२८॥ ज्यालागीं कीजे जप ध्यान । ज्यालागीं कीजे तपःसाधन । ज्यालागीं कीजे अनुष्ठान । तें हें चिद्रत्न श्रीराम ॥२९॥ ज्यालागीं कीजे वेदपठण । ज्यालागीं कीजे शास्त्रश्रवण । ज्यालागीं कीजे योगसाधन । तें हें चिद्रत्न श्रीराम ॥३०॥ ज्यालागीं कीजे व्रत तप । ज्यालागीं कीजे रुद्रजप । ज्यालागीं धैर्य आकल्प । तें हें चित्स्वरूप श्रीराम ॥३१॥ ज्यालागीं शिवभवानी । नित्य चिंतिती अनुदिनी[7] । तो हा श्रीराम देखिला नयनीं । जो त्रिभुवनीं परमात्मा ॥३२॥ ज्यालागीं आम्ही नित्य तापसी । ज्यालागीं आम्ही वनवासी । तो हा श्रीराम अनायासीं । भाग्यें आश्रमासी स्वयें आला ॥३३॥ ऐसें ऋषींचें मनोगत । जाणोनिया सुनिश्चित । श्रीराम उल्हासयुक्त । चरण वंदित ऋषींचे ॥३४॥ श्रीराम ऋषींचें मनोगत । हृदयीं जाणतो हृदयस्थ । श्रीराम परब्रह्म निश्चित । ऋषि जाणत निजज्ञानें ॥३५॥ देखणें देखोनि अति तीक्ष्ण । यालागीं नांवे सुतीक्ष्ण । त्याचे श्रीरामें वंदिलें चरण । दिधलें आलिंगन ऋषीनें रामा ॥३६॥

स निरीक्ष्य तो धीरं रामं दशरथात्मजम् । मूर्घ्न्यवघ्राय चाश्लिष्य बाढं वचनमब्रवीत् ॥९॥
उपजिघ्रन्नतो मूर्घ्नि वचनं चेदमब्रवीत् । मत्प्रसादात्सभार्यस्त्वं विहरस्व सलक्ष्मणः ।
रामस्तु सहसौमित्रिः सुतीक्ष्णेनाभिपूजितः ॥१०॥

---

शब्दार्थ – १. अगदी कमी प्रतीचा चाकर, २. विद्वान्, बुद्धिवान्, ३. मोठ्या मानाच्या गोष्टी; तुमच्या मानास मी पात्र नाही. ४. ब्राह्मणांचे संरक्षण, ५. स्वपराक्रमेकरून, ६. सुखदायक, ७. प्रतिदिवशी.

स्वयें सुतीक्ष्णें आपण । आलिंगोनि श्रीराम लक्ष्मण । करोनि मस्तकीं अवघ्राण[1] । आल्हादें वचन बोलत ॥३६॥ माझा आश्रम दंडकारण्य । येथें नाहीं भयबंधन । श्रीराम सीता लक्ष्मण । सुखसंपन्न वसावें ॥३७॥ माझिया निजआश्रमाआंत । न चले राक्षसांचा घात । सुखें वसावें श्रीरघुनाथ । सीतासमवेत स्वानंदें ॥३८॥ अति प्रेमें सुतीक्ष्ण । पूजोनियां श्रीरामलक्ष्मण । देवोनि वनफळीं भोजन । षण्मास पूर्ण राहविले ॥४०॥

तमुग्रतपसा दीप्तं महर्षिं सत्यवादिनम् । आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने ॥११॥
एवमुक्तस्तु रामेण महर्षिर्लोकविश्रुतः । अब्रवीन्मधुरं वाक्यं हर्षेण महता युतः ॥१२॥

दंडकारण्यात कोठे राहाणे योग्य? : सुतीक्ष्ण तपस्तेजोराशी । श्रीराम पुसे स्वयें त्यासी । मज रहावया आश्रमासीं । स्थान नेमेंसीं सांगावें ॥४१॥ शरभंगाची आज्ञा ऐसी । सुतीक्ष्ण सत्यवादी तापसी । स्थाननेम पुसोनि त्यासी । त्या आश्रमासी वसावें ॥४२॥ ऐकतां श्रीरामाचें वचन । ऋषि झाला सुखसंपन्न । दिधलें श्रीरामा आलिंगन । सर्वांगीं पूर्ण निवाला ॥४३॥ हर्षे सांगे श्रीरामासी । दंडकारण्यनिवासी ऋषी । पाहें त्यांच्या आश्रमांसी । देखतां तुम्हांसी आल्हाद ॥४४॥ जे जे आश्रमीं तुम्हांसी । विश्रांति वाटेल अतिशयेंसी । त्याचिया निवासस्थांनासी[2] । नेमस्तेंसी नेमीन ॥४५॥ करोनि ऋषिआश्रमदर्शन । शीघ्र येथें यावें आपण । मग मी निवासाचें स्थान । नेमस्त जाण नेमीन ॥४६॥ ऐकोनि ऋषीचें वचन । श्रीराम सीता लक्ष्मण । तिघीं करोनियां नमन । केलें गमन दंडकारण्या ॥४७॥

जाण्याचा क्रम बदलण्याची लक्ष्मणाची सूचना : तंव बोलिला लक्ष्मण । मागें सीता चालतां जाण । विराधें केलें होतें हरण । तैसें आपण न करावें ॥४८॥ पुढें श्रीराम मागें सौमित्र । मध्यें घालोनियां सीता सुंदर । वेगीं निघाले सत्वर । धनुर्धर महाबळी ॥४९॥ सीतेपासीं ऋषिगण । तापस ब्रह्मचारी ब्राह्मण । श्रीरामासवें निघाले जाण । त्यांसही रक्षण श्रीराम ॥५०॥ वनें उपवनें शुभ काननें । ऋषिआश्रम अगाध स्नानें । तापस करिताती अनुष्ठानें । वेदाध्ययनें अग्निहोत्रें ॥५१॥ पाहतां ऋषींचें महिमान । आलोडिती[3] दंडकारण्य । तंव पुढें तडागीं सुगायन । श्रीराम लक्ष्मण ऐकताती ॥५२॥ श्रेष्ठ तडाग[4] अति पुनीत । त्यामाजीं मनोहर नृत्यगीत । परी गातें नाचतें न दिसे तेथ । तेणें विस्मित श्रीराम ॥५३॥

पंचाप्सर सरोवरावर नृत्यगीत ऐकून त्याचा वृत्तान्त विचारतात : सवें चालती ऋषिगण । त्यांसी श्रीराम पुसे आपण । येथें गीत नृत्य करी कोण । मग ते पूर्वकथन सांगती ॥५४॥

ऋषभ उवाच :
इदं पंचाप्सरो नाम तटाकं पूर्वकालिकम् । निर्मितं तपसा राम मुनिना मांडकर्णिना ॥१३॥
स हि तेपे तपस्तीव्रं मांडकर्णिर्महामुनिः । दशवर्षसहस्राणि वायुभक्षो जलाशये ॥१४॥

या तडागा नाम पंचाप्सर । पुरातन हें सरोवर । निर्मिता मांडकर्णि ऋषीश्वर । तेणें तप तीव्र केलें ॥५५॥

मंदकर्णींचा तपोभंग करण्यासाठी अप्सरा : येथें दहासहस्र वर्षीं । निराहारी वायुभक्षी । त्याची स्थिर बुद्धि कैसी । काम मानसीं स्पर्शेना ॥५६॥ कर्मठ म्हणती स्वर्ग चांग । ऋषि म्हणे तो क्षयरोग । सत्यलोकींचे जे जे श्रेष्ठ भोग । तो मरणमार्ग तयाचा ॥५७॥ जेथवरी विषयासक्ती । तेथवरी पुनरावृत्ती । ऐसें जाणोनि निश्चितीं । तीव्र तपस्थिति[5] मांडकर्णि ॥५८॥ त्याच्या देखोनि तीव्र तपासी । स्वर्गीं हाहाकार सुरवरांसी । इंद्रें विघ्न मांडिले त्यासीं ।

शब्दार्थ – १. मस्तक हुंगून, २. रहाण्याचे जागी, ३. संचार करतात, ४. सरोवरावर, ५. ज्याची कडकडीत तपश्चर्येच्या ठिकाणी जाज्वल्य निष्ठा आहे असा.

पंचाप्सरांसी धाडिलें ॥५९॥ रूप यौवन मनोहर । गीत नृत्य सालंकार । तें देखोनियां ऋषीश्वर । कामतत्पर[1] पैं जाला ॥६०॥ त्याची देखोनि कामासक्ती । अप्सरा नागव्या नाचती । तोही लिंग धरोनियां हातीं । निजकामार्थी नाचत ॥६१॥

ऋषींचा प्रक्षोभ व अप्सरांचे पलायन : त्यांसी झोंबोनि मागतां रती । त्या निघाल्या ऊर्ध्व-गती । त्यांसी ऋषि येत काकुळती । कृपेनें रती मज द्यावी ॥६२॥ मज रत्यर्थीं अतीतासी[2] । विमुख होतां नये तुम्हांसी । मी लागतों तुमच्या पायांसी । कृपेनें रतीसी मज द्यावें ॥६३॥ मी तुमचा धर्मसांगाती । परमार्थी मज द्यावी रती । त्यांचें अंगुष्ठ धरी दातीं । तंव त्या जाती उपेक्षोनी ॥६४॥ तंवचि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता[3] न देखे दृष्टीं । एकांती तीस जालिया भेटीं । विरक्तही उठी भोगार्थीं ॥६५॥ हो का कामिनी एकदा मनीं । एकांतींच देखतां नयनीं । धांवोनि झोंबती जपी ध्यानी । तपोनिर्दळणी[4] स्त्रीसंग ॥६६॥ जंव पुरुषासी अति विरक्ती । तंवचि सिद्धी ओळंगती । पुरुष जालिया कामासक्ती । सिद्धी जाती थुंकोनी ॥६७॥ स्त्रीगीत पडतां कानीं । वैराग्य गेलें हरपोनी । यालागीं नांवें मंदकर्णी । श्रुतिपुराणीं अभिधान ॥६८॥ प्रमदागाणें ऐकोनि कानीं । प्रमाद पावला तत्क्षणीं । वैराग्य विवेक गेलिया दोनी । मंदकर्णि तेणें नाम ॥६९॥

नीतो मदनवश्यत्वं सुराणामर्थसिद्धये । ताश्चैवाप्सरस: पंच मुनिपत्नीत्वमागता: ॥१५॥
तटाके निर्मितं तासां तस्मिन्नंतर्हितं गृहम् । तत्रैवाप्सरस: पंच निवसंत्या यथासुखम् ॥१६॥
रमयंति तपोयोगान्मुनिं यौवनमास्थितम् । तासां संक्रीडमनानामेष वादित्रनिस्वन: ॥१७॥
तडागे निर्मितं तासां तस्मिन्नंतर्हिततं गृहम् ॥१८॥

इंद्राचे वरप्रदान : तिहीं अप्सरीं पांचा जणीं । सुरकायार्थ साधोनी । ऋषि मोहिला स्त्रीमोहनी । कामगाणीं संतप्त ॥७०॥ इंद्रें करविलें विघ्नासी । ऐसें कळलिया तया ऋषीसी । कोपोनि देईल शापाशी । तेणें इंद्रासी महाभय ॥७१॥ भूत भविष्य वर्तमान । ऋषीस होय त्रिकाळज्ञान । अपूर्ण कामें कोपायमान । शाप दारुण देईल ॥७२॥ ऋषि तापसी महाक्रूर । दहा सहस्र वर्षें तप अत्युग्र । शात देईल अति दुर्धर । धाकें सुरेंद्र कांपत ॥७३॥ शापभयें अतिसत्वर । ऋषीपासीं आला इंद्र । मागसी तो देईन वर । आज्ञाधार मी स्वामी ॥७४॥ तंव ऋषि म्हणे इंद्रासी । पंचाप्सरा लावण्यराशी । त्या मज द्याव्या नित्यभोगासी । इंद्रें ऋषीसी दीधल्या ॥७५॥ दहासहस्र वर्षीं । तपें जरठ जर्जर ऋषी । तो नावडे अप्सरांसी । म्हणोनि त्यासी उपेक्षिती ॥७६॥ जाणोनि अप्सरांचे मन । ऋषि सामर्थ्यें अति संपन्न । जाला स्वरूपें मदनमोहन । विराजमान तारुण्यें ॥७७॥ देखोनि ऋषीच्या रूपासी । अप्सरा भुललिया सर्वस्वेंसी । आन पुरुष नावडे त्यांसी । जीवभावेंसीं विनटल्या[3] ॥७८॥ ऋषि सामर्थ्यें अत्यंत थोर । ते तडागजळीं जळांतर । उभारोनि निजमंदिर । क्रीडातत्पर पंचाप्सरीं ॥७९॥ त्यांचे गीतनृत्यध्वनी । श्रीराम पडिले तुझे श्रवणीं । ऐसे सांगती सकळ मुनी । विस्मित मनीं श्रीराम ॥८०॥ तेथील करितां आचमन । श्रीराम देखे ऋषिभुवन । मंदकर्णीस आल्हाद पूर्ण । श्रीरघुनंदन देखोनि ॥८१॥

मंदकर्णीचे स्वागत : अति आदरेंकरोनि ऋषीं । श्रीराम नेला निजभवनासी । सीता राम लक्ष्मण त्रिवर्गांसी । वर्षानुवर्षीं राहविलें ॥८२॥ मंदकर्णी ऋषीश्वर । श्रीरामसेवेसी तत्पर । पंचाप्सरा अति सादर । श्रीरामचंद्रनिजभजना ॥८३॥ पूर्वी निष्काम तपोवृत्ति । त्या तपाची

---

शब्दार्थ – १. काममोहित, २. अतिथीला, ३. स्त्री, ४. तपाचा नाश करणारा.

फलप्राप्ति । घरा आली श्रीराममूर्ति । हर्ष निश्चितीं सभाग्य ॥८३॥ त्याचें भाग्य वानूं किती । चढती वाढती नित्यप्रीती । श्रीरामाची आवडे भक्ती । अहोरात्रीं उल्हास ॥८४॥ जपतां श्रीरामनाम वाक्पुटीं । उद्धरले कोट्यनुकोटी । श्रीरामप्रेम धरितां पोटीं । ब्रह्मसंतुष्टी ऋषिवर्या ॥८५॥ करितां श्रीरामाची भक्ती । मंदकर्णि पावला मुक्ती । पंचाप्सरा त्याचे संगतीं । निजात्ममुक्ती पावल्या ॥८६॥ श्रीरामनामें जड तरती । तो श्रीराम देखतां अति प्रीतीं । चारी मुक्ती दासी होती । श्रीरामभक्तिप्रतापें ॥८७॥ ऋषीस ब्रह्मसमाधान । अप्सरा जाल्या सुखसंपन्न । करोनियां दीनोद्धरण । रघुनंदन निघाला ॥८८॥

उषित्वा स सुखं तत्र पूज्यमानो महर्षिभिः । जगाम चाश्रमांस्तेषां पर्यायेण तपस्विनाम् ॥१९॥
क्वचित्परिदशान्मासानेकसंवत्सरं क्वचित् । क्वचिच्च चतुरो मासान्पञ्च षट् च परान्क्वचित् ॥२०॥
अपरत्राधिकान्मासानध्यर्धमधिकं क्वच्चित् । त्रीन्मासानष्टमासांश्च राघवो न्यवसत्सुखम् ॥२१॥
तत्र संवसतस्तस्य मुनीनानाश्रमेषु वै । रमतश्वानुकूल्येन ययुः संवत्सरा दश ॥२२॥
परिसृत्य च धर्मज्ञो राघवः सह सीतया । सुतीक्ष्णस्याश्रमपदं पुनरेवाजगाम ह ॥२३॥

आश्रमाचे निरीक्षण करीत सुतीक्ष्णाचे पुनः आमगन : मंदकर्णीचें देखोनि प्रेम । त्या आश्रमीं सुखी जाला श्रीराम । ऋषिही सुखी जाला परम । सुखसंभ्रम[1] अप्सरां ॥८९॥ सुखी जालीं लक्ष्मण सीता । मग ऋषीस पुसोनि तत्त्वतां । पहावया आश्रमां समस्तां । होय निघता श्रीराम ॥९०॥ ऋषिआश्रम सावकाश । कोठे मास कोठें दोन मास । कोठें नेमस्त पंच मास । कोठें षण्मास श्रीराम राहे ॥९१॥ कोठें वर्ष दीड वर्षीं । कोठें राहे चतुर्मासीं । ऐसा विचरता[2] वनवासीं । सुतीक्ष्णापासीं राम आला ॥९२॥ श्रीरामाचें पुनरागमन । तेणें हरिखला[3] सुतीक्ष्ण । आलिंगिले श्रीराम लक्ष्मण । आल्हाद पूर्ण ऋषिवर्या ॥९३॥ नित्य श्रीरामपूजन । देवोनि वनफळें भोजन । राहविला श्रीरघुनंदन । किंचिन्न्यून[4] अर्धाब्द[4] ॥९४॥

अगस्ति-आश्रमाला प्रयाण : श्रीराम बैसोनि सावकासीं । सादरें पुसे सुतीक्ष्णासी । अगस्त्याश्रम जये प्रदेशीं । तेथें आम्हांसी धाडावें ॥९५॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । सुतीक्ष्ण म्हणे धन्य धन्य । अगस्त्याश्रम परम पावन । वश्य गमन तेथें कीजे ॥९६॥ वन लागलेंसे घनदाट । सहसा मार्ग न कळे स्पष्ट । स्वामींनीं दाखवावी वाट । अवस्था उत्कट गमनार्थी ॥९७॥ श्रीरामा मी सांगूं किती । तूं आमच्या गतीची गती । मार्ग पुससी आम्हांप्रती । आश्चर्य किती सांगावें ॥९८॥ येथोनि असे अर्धयोजन । अगस्तीचें आश्रमस्थान । येणें मार्गें करावें गमन । ऐसें सुतीक्ष्ण बोलिला ॥९९॥ सीता राम लक्ष्मण । ऋषीस करोनियां नमन । तिघीं जणीं केलें गमन। अगस्तिस्थान लक्षूनी ॥१००॥

अगस्तीचा महिमा : अगस्तीचें निजमहिमान । ऐकें श्रीरामा सावधान । वातापी इल्वल ब्राह्मणघ्न[5] । त्यांचे निर्दळण तेणें केलें ॥१॥

इहैकदा किल क्रूरो वातापिरपि चेल्वलः । भ्रातरौ सहितावास्तां ब्राह्मणघ्नौ महासुरौ ॥२४॥
वातापी ब्राह्मणं रूपमिल्वलः संस्कृतौदनम् । आमंत्रयति विप्रान्स श्राद्धमुद्दिश्य निर्घृणः ॥२५॥

वातापी इल्वलांचा नाश : । वातापी ब्राह्मण होय आपण । इल्वल कपटें होय अन्न । ब्राह्मण निमंत्रोनि[6] जाण । श्राद्धभोजन संतृप्त देती ॥२॥ वातापी बोभाय[7] बंधूसी । येरू निघे फोडोनि द्विजकुशी । यापरी तिहीं ब्राह्मणांसी। छळोनि राक्षसीं मारिजे ॥३॥ ऐसें जाणोनि ब्राह्मणघाती।

---

शब्दार्थ - १. अत्यंत सुख, २. फिरणारा, ३. आनंद पावला, ४. अर्ध्या वर्षांत थोडे कमी दिवस, ५. ब्राह्मणांस ठार मारणारे, ६. बोलावून, ७. हाक मारी.

त्यांपासीं स्वयें आला अगस्ती । इल्वलओदनान्नप्रयुक्ती[1] । दिधलें संतृप्त भोजन ॥४॥ अगस्ती प्रतिग्रासोग्रासीं । भस्म करी जठराग्नीसी । ठाव नाहीं इल्वकासी । कवणें कुशी फाडावी ॥५॥ वातापी बोभाय इल्वलासी । तंव अगस्ति म्हणे म्यां जिरविलें त्यासी । कोप आला वातापीसी । अगस्तीसी गिळूं धांवे ॥६॥ विकट[2] धरोनि राक्षसवेष । दारुण देवोनियां हाक । धांवला अगस्तिसम्मुख । विक्राळ मुख पसरोनी ॥७॥ अगस्तिनेत्रींचा कोपाग्नी । वातापी सांडिला जाळोनी । भस्म केला अर्धक्षणीं । जो कां ब्राह्मणीं छळघाती ॥८॥ ऐसे पापा राक्षस दोनी । अगस्तीनें सांडिलें जाळोनी । ऐसा प्रतापी महामुनी । अवश्य दर्शनीं जावें तुम्हीं ॥९॥

अयमाख्यामि ते राम यत्रागस्त्यो महामुनिः । योजनान्याश्रमात्तात याहि चत्वारि वै ततः ॥२६॥
दक्षिणेन महान्श्रीमानगस्त्यभ्रातुराश्रमः । तत्रैकां रजनीं व्युष्य प्रभाते राम गभ्यताम् ॥२७॥

मार्गात अगस्तीचे धाकटे बंधु महामतींची भेट : स्वयें सांगे सुतीक्ष्ण । पुढें वन अति गहन । सहसा न टाकीं अगस्तिस्थान । सांगेन खूण ते ऐका ॥११०॥ ज्येष्ठ बंधु नांवें अगस्ती । कनिष्ठा नाम महामती । तेथोनि अर्धयोजनांतीं । आश्रमस्थिति तयाची ॥११॥ जावोनि त्याच्या आश्रमाप्रती । आजिची तेथें क्रमोनि राती । प्रात:काळीं श्रीरघुपती । तुम्हां अगस्ति भेटेल ॥१२॥ महामतीची वनस्थळी । न पेरितां साळी केळी । पिंपळी नागवेली पोफळी । आश्रमाजवळी शोभती ॥१३॥ ऋषिसत्तम महामती । तुम्हांसी भेटावया अगस्ती । ज्या ज्या सांगेल गमनगती[3] । त्या त्या स्थितीं तुम्हीं जावें ॥१४॥ सुतीक्ष्णा करोनि नमन । तिघीं जणीं केलें गमन । वने उपवनें[4] शोभायमान । वसतिस्थान महामतीचें ॥१५॥ आश्रमा आला श्रीरघुपती । परम आल्हाद महामती । राहवोनियां अति प्रीतीं । सीतपति पूजिला ॥१६॥ एकाजनार्दना शरण । वधावया त्रिशिरा खर दूषण । अगस्तीसी श्रीरामदर्शन । अस्त्रग्रहण[5] ऋषिवरदें ॥१७॥ इति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां श्रीरामपंचाप्सरामंद-कर्ण्यद्धरणं नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ ओंव्या ॥११७॥ श्लोक ॥२७॥ एवं ॥१४४॥

## अध्याय पाचवा

### अगस्ती ऋषींकडून श्रीरामास अस्त्रप्राप्ती

ताबडतोब आजच जाण्याचा उपदेश : श्रीरामचंद्राय नमः ॥ श्रीराम म्हणे महामती । तुझा जेष्ठ बंधु अगस्ती । तयाचिया दर्शनार्थी । तुम्हांप्रती मी आलों ॥१॥ करावया ज्येष्ठाचें दर्शन । अति उदति[6] माझें मन । कोणें मार्गें करावें गमन । कृपा करोनि सांगावें ॥२॥.

यदि बुद्धिः कृता राम द्रष्टुं तं मुनिपुंगवम् । अद्यैव गमने बुद्धिं रोचयस्व महामते ॥१॥

जरी अगस्तीचें दर्शन । करावया वांछी तुझें मन । तरी आजचि करावें गमन । विलंबव्यवधान[7] न करावें ॥३॥

आश्रमातील देवस्थाने : जे मार्गी करितां गमन । सर्वथा न चुकिजे आपण । तैसें सांगेन मार्गचिन्ह । सावधान अवधारा ॥४॥ जे चालतां निजपंथ । सीता श्रीराम सुखी होत । सौमित्राचें सुखावें चित्त । तो पंथ संकेतें[8] अवधारा ॥५॥ अगस्त्याश्रम अति पावन । शिवादि देवीं निर्मूनि भुवन । करिताती अनुष्ठान । नित्य श्रवण श्रीरामकथा ॥६॥ देवांचे भूमीं न लगती पाये । अगस्त्याश्रमीं तेहीं पाहें । बैसोनियां देवसमुदाये । श्रवण होताहे

---

शब्दार्थ - १. इल्वलरूपी भात जेवून, २. भयंकर, ३. जावयाचे मार्ग, ४. बागबगीचे, ५. अस्त्रविद्येचा स्वीकार, ६. उत्सुक, ७. विलंबरूप अडथळा, ८. खुणेने.

श्रीरामकथा ॥७॥ पावन श्रीरामायणी कथा । श्रीअगस्ति अति रसाळ वक्ता । देव बैसोनि तत्वतां । श्रीरामकथा परिसती ॥८॥ अगस्त्याश्रमीं देवस्थानें । उभविलीं[१] आहेति कोण कोणें । तेहीं ऐका सावधानें । मार्गचिन्ह लक्षावया ॥९॥

स तत्र ब्राह्मणः स्थानं शिवस्थानं तथैव च । अग्नेः स्थानं महेन्द्रस्य स्थानं चैव विवस्वतः ॥२॥

स्थानं धातुर्विधातुश्च वायुस्थानं तथैव च । कार्तिकेयस्य च स्थानं धर्मस्थानं तथैव च ॥३॥

मार्ग सुचिन्ह नित्य निर्विघ्न । त्या मार्गाची ऐका खूण । सौब्रह्मण्य ब्रह्मस्थान । शिवस्थान शिवशक्ति ॥१०॥ इंद्रचंद्रकुबेरस्थान । अग्निस्थान भृगुस्थान । यमस्थान धर्मस्थान । नित्य सावधान श्रवणार्थी ॥११॥ धाता विधाता आपण । रामायण सुखसंपन्न । वायु सांडोनि चंचळपण । अति तल्लीन श्रवणार्थी ॥१२॥ स्वामिकार्तिक शिवसुत । तोही तेथें नित्य वसत । ऋषीस परमार्थ पुसत । ऋषि सांगत स्वानंदें ॥१३॥ काशीखंड केदारखंड । सांगितलें श्रीशैलखंड । श्रीरामायणकथा अति गोड । सुख सुरवाड[२] सर्वांसी ॥१४॥ अनागतभाष्य[३] रामायण। ते कथेचें करावें श्रवण । आश्रमीं वसती देवब्राह्मण । रम्य रामायण परिसावया ॥१५॥ अगस्त्याश्रममहिमान । देव दानव द्विज पावन । श्रीरामा शीघ्र करीं गमन । मार्ग सुचिन्ह लक्षोनी ॥१६॥

ततस्तद्वचनं श्रुत्वा सह भ्रात्राभिवाद्य च । प्रतस्थेऽगस्त्यमुद्दिश्य सानुजः सह सीतया ॥४॥

ऐकोनि ऋषीचें वचन । श्रीराम झाला सुखसंपन्न । अगस्त्याश्रम अति पावन । स्वानंदें गमन करूं रिघे ॥१७॥

अगस्तींकडून स्वागत : श्रीराम सीता लक्ष्मण । अगस्त्यानुजा वंदोनि जाण । सन्मार्गाचें लक्षोनि चिन्ह । शीघ्र गमन तिहीं केलें ॥१८॥ अगस्ति ज्ञानें अति समर्थ । स्वानंदे शिष्यांसी सांगत । आता येईल श्रीरघुनाथ । सीतासहित सौमित्र ॥१९॥ गुढिया मखरें आश्रमांत । ऋषि उभवी आल्हादयुक्त । परब्रह्म मूर्तिमंत । आतां येथें येईल ॥२०॥ माझ्या भाग्याच्या फळल्या कोडी[४] । आजी श्रीराम देखेन आवडीं । उभवावया श्रीरामराज्याची गुढी । वना तांतडी आलासे ॥२१॥ मारोनि राक्षसांच्या कोडी । तोडावया नवग्रहांची बेडी । फेडावया देवांची बांधवडी । वना तांतडी आलासे ॥२२॥ निजधर्माचें संरक्षण । करावया दुष्टनिर्दळण । श्रीराम अवतार परिपूर्ण । कृपेनें आपण येथें आला ॥२३॥ आजि मी सभाग्य त्रिजगतीं । जो वेदशास्त्रां नव्हे व्यक्ती[५] । तो राम केवळ कृपामूर्ती । सीतापति कृपाळु ॥२४॥ माझें भाग्य बापुडें किती । श्रीराम केवळ कृपामूर्ती । आश्रमा आला श्रीरघुपती । कृपामूर्ति श्रीराम ॥२५॥

ततः शिष्यैः परिवृतो निश्चक्राम महामुनिः । तं ददर्शाग्रतो रामो भ्रातरं चेदमब्रवीत् ॥५॥

बहिर्लक्ष्मण निष्कामत्यगरस्त्यो भगवानृपिः । औदार्येणागवच्छामि निधानं तपसामिदम् ॥६॥

एवमुक्त्वा महाबाहुरगस्त्यं सूर्यवर्चसम् । अभिवाद्य तु धर्मात्मा तस्थौ राम कृतांजलिः ॥७॥

श्रीरामांचे साष्टांग वंदन : ऐसी करोनि रामस्तुती । मेळवोनि ऋषींच्या पंक्ती । शिष्यसमुदायेसीं अगस्ती । आला अति प्रीतीं सामोरा ॥२६॥ येतां देखोनियां ऋषी । श्रीराम म्हणे लक्ष्मणासी। अगस्ति तपस्तेजोराशी । येतो आम्हांसी सामोरा ॥२७॥ समुद्र शोषिला आचमनीं । तो हा जाण अगस्तिमुनी । कृपाळु कैसा आम्हांलागोनी । येतो धांवोनी सामोरा ॥२८॥ ऐसें बोलोनि आपण । श्रीरामें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिलें दृढ चरण । दिधलें आलिंगन ऋषीनें रामा ॥२९॥ विदेहतनया[६] लक्ष्मण । नमस्कारिती मुनिचरण । तिघे जण सावधान । कर जोडोन

---

शब्दार्थ - १. उभारली, २. अतिशय, ३. भविष्यवाणींनी युक्त रामायण, ४. कोटी (संख्या), ५. उघड, ठाऊक, ६. जनककन्या सीता.

राहिलीं ॥३०॥ देखोनियां श्रीरामचंद्र । ऋषीस आल्हाद अपार । आश्रमा आणिता गजर । जयजयकार ऋषिमंत्रीं ॥३१॥ अगस्ति ऋषि स्वयें सज्ञान । ब्रह्ममूर्ति श्रीरघुनंदन । केलें मधुपर्कें पूजन। दिधलीं गोदानें शतसंख्य ॥३२॥ श्रीराम म्हणे मी नीच सेवक । तुझ्या शिष्याचे रंकाचा रंक । येवढी पूजा अलोलिक । योग्य देख मज नोहे ॥३३॥

**अगस्त्य उवाच –**

राजा सर्वस्य लोकस्य धर्मचारी दृढव्रत : । पूजनीयश्च मान्यश्च भवान्प्राप्तः प्रियातिथिः ॥८॥

**ऋषींकडून रामस्तुती व महिमावर्णन :** ऐकोनि श्रीरामाचें वचन । अगस्ति बोले उल्हासोन । श्रीराघवा तुझें निजमहिमान । अगम्य जाण वेदशास्त्रां ॥३४॥ वेदशास्त्रांच्या निजयुक्ती । त्या परतल्या नेति नेति[1] । श्रीराम केवळ ब्रह्ममूर्ती । त्रिजगतीं निजपूज्य ॥३५॥ जें कां परब्रह्म अक्षर[2]। तें तूं श्रीराम साचार । भक्तकृपाळू होसी साकार । भाग्य थोर आजि माझें ॥३६॥ वरकड राजे ते भूपती । श्रीरामराजा त्रिजगतीं । तुझेनि भूतें वाहे क्षिती । शशिसूर्यां गति तुझेनि ॥३७॥ तुझी आज्ञा अति दुर्धर। मर्यादा नुल्लंघीच सागर । इंद्रादिक तुझे किंकर । तुझेनि भूभार[3] शेष वाहे ॥३८॥ काळ आज्ञा वंदी शिसीं । प्रळयो करी मर्यादेसीं । भूतें भूतात्मा तूं होसी । पूज्य सर्वांसी श्रीरामा ॥३९॥ अवतार जाले उत्तमोत्तम । त्यांमाजी तूं आत्माराम । तूं तंव केवळ परब्रह्म । पूज्य परम परमार्थी ॥४०॥ ऐसी निजस्थिति तुजपासीं । तो तूं धर्मव्रत चालविसी । पित्राज्ञा प्रतिपाळिसी । निर्दाळिसी दृष्टातें ॥४१॥ माता पिता गुरु देवता । त्यांहूनि पूज्य तूं श्रीरघुनाथा । ब्रह्मादि देवांहीवरता । परम पूज्यता श्रीरामा ॥४२॥ चारी देव तुज वर्णिती । शास्त्रें चरणां शरण येती । शिव विरिंचि[4] पायां लागती । पूज्य परमार्थी श्रीरामा ॥४३॥ तुज द्यावा जो जो मान । तो तो तुजलांगीं होय न्यून । तुझें अगाध महिमान । मानापमान तुजं नाहीं ॥४४॥ श्रीरामा तुझें निजमहिमान । वानितां[5] वेदां पडिलें मौन । तो तूं आलासी कृपा करून । आजि मी धन्य स्वाश्रमेंसीं ॥४५॥ कांहीएक तुझी पूजा । मी करीन रघुराजा। ते अंगीकारीं अधोक्षजा। राक्षससमाजवधार्थी ॥४६॥ तूं आत्माराम प्रिय अतिथी। आश्रमा आलासी कृपामूर्ती । तुझी पूजा जे न करिती । ते अधःपाती अभाग्य ॥४७॥ विमुख होतांचि अतिथी । गृहस्था कोटिपापप्राप्ती । अतिथी ने पुण्यसंपत्ती । उरे अधोगति यजमाना ॥४८॥ यालांगीं श्रीरघुराजा । करावी अतिथीची पूजा । तूं केवळ आत्मा माझा । माझी निजपूजा अंगीकारीं ॥४९॥ अमृतोपम फळमूळें । पुष्पें आणोनि सुपरिमळें[6]। मधुपर्कविधान-बळें[7]। श्रीराम सुखमेळें पूजिला ॥५०॥ जयजयकाराच्या गजरीं । वेदोक्त महामंत्रीं । श्रीराम पूजिला ऋषीश्वरीं । चराचरीं परमात्मा ॥५१॥ अगस्ति म्हणे श्रीरघुराजा । पुढतीं करीन तुझी पूजा । दिव्यायुधीं अधोक्षजा । शत्रुसमाजा निवटावया[8] ॥५२॥

इदं दिव्यं महच्चापं तृणी चाक्षय्यसायकौ । इदं च मे तनुत्राणमभेद्यं भगवान्ददौ ॥९॥
अमोघः सूर्यसंकाशो ब्रह्मदत्तः शरौ मम । महाराजतकोशोऽयमसिर्हेमविभूषितः ॥१०॥
अनेन धनुपा राम हत्वा संख्ये महासुरान् । आजहार श्रियं दीप्तां पुरा विष्णुर्दिवौकसाम् ॥११॥
एवमुक्त्वा महातेजाः समस्तं तद्वरायुधम् । दत्वा रामाय भगवानगस्त्यः पुनरब्रवीत् ॥१२॥
राम प्रीतोऽस्मि भद्रं ते परितुष्टोऽस्मि लक्ष्मण । अभिवादयितुं यन्मां प्राप्तौ स्थःसह सीतया ॥१३॥

**दिव्य, अक्षय असे धनुष्य, भाते, कवच अर्पण :** दिव्य चाप अक्षयी भाते । अनिवार शर पूर्ण तेथें ।

---

शब्दार्थ – १. हे नाही, ते नाही असे म्हणून, २. ज्यास नाश नाहीं असे, ३. पृथ्वी ४. ब्रह्मदेव, ५. वर्णिता, ६. सुवासिक, ७. मधुपर्कादि विविधपूर्वक, ८. नाश करण्याकरिता.

सुवर्णसंनाह[1] खड्गातें । रणीं शत्रूंतें निवटावया ॥५३॥ शस्त्रास्त्रीं अभेद्य पूर्ण । सूर्यतेजें विराजमान । तें घेई गां अंगत्राण[2] । देदीप्यमान तेजस्वी ॥५४॥ कवच लेत्यासी[3] हे विश्रांती । शत्रुसंतापी निजतेजोदीप्ती । ऐसी हे कवचाची गती । रिपुदळणार्थीं अंगीकारीं ॥५५॥ रणीं मर्दावया लंकानाथ । रथापेक्षा[4] करील चित्त । ते काळीं इंद्राचा रथ । मातलि त्वरित आणील ॥५६॥ ऋषीचें ऐकोनि वचन । श्रीरामें सौमित्रें केलें नमन । ऋषीनें दिधलें आलिंगन । सुप्रसन्न ऋषि जाला ॥५७॥ संतोषोनि श्रीरामासी । रणीं निर्दाळावया राक्षसांसी । उल्हासोनि अगस्ति ऋषी । दिव्यायुधांसी[5] अर्पीलें ॥५८॥ देवोनियां दिव्यायुधें । ऋषि म्हणे अति आल्हादें । रणीं राक्षसांची कबंधें[6] । शस्त्रसंबंधें नाचविसी ॥५९॥ ऐकोनि ऋषीच्या वरदासी । श्रीराम संतोषला मानसीं । तंव लोपामुद्रेनें सीतेसी । अति उल्हासीं पूजिलें ॥६०॥

लोपामुद्रेकडून सीतेचे कौतुक : लक्षोनियां श्रीरघुनंदन । चरणचाली वनाभिगमन । तूं पतिव्रता धन्य धन्य । आम्ही पावन तुझेनि ॥६१॥ तंव श्रीराम म्हणे अगस्तीसी । दंडकारण्य या वनासी । कां म्हणताती महाऋषी । तें मजपासी सांगावें ॥६२॥ मग अगस्ति म्हणे श्रीरामासी । दंडक राजा या प्रदेशीं । अति गर्विष्ठ अहर्निशीं । राज्यमदेंशीं उन्मत्त ॥६३॥ पारधी करितां दंडकासी । भृगुवंशींचा च्यवन ऋषी । अपमानिला अतिशयेंसीं । तेणें त्यासी शापिलें ॥६४॥

दण्डकेन परित्यक्तः स्वयं देशो महात्मना । भार्गवस्य तु शापेन निर्मुनुष्यो मृगोऽभवत् ॥१४॥
योजनानां सहस्त्रे तु विन्ध्यपादप्रदक्षिणम् । नाति वर्शति पर्जन्यो न च वाति सुखोऽनिलः ॥१५॥

दंडकारण्य कथा : शाप दिधला कोपेंसीं । भस्म होय स्वराज्येसीं । ऐसें बोलतांचि ऋषी । स्वदशेंसीं भस्म जाला ॥६५॥ विंध्याद्रिदक्षिणभागेंसीं । जंव पाविजे सेतुबंधासी । तंव दंडकारण्य नाम यासी । ऋषिशापेंसीं भस्म जालें ॥६६॥ राजा भस्म जाला ससैन्य । भस्म जाले मनुष्यगण । भस्म जाले वृक्ष तृण । पशु पक्षी पूर्ण भस्म जाले ॥६७॥ भस्म जालीं सरितातडांगं[7] । भस्म जाले मृग पन्नग[8] । भस्म जालें तद्देशी जग । दुर्धर राग ऋषीचा ॥६८॥

शापवाणीने प्रदेश ओसाड : दंडकाचेनि शापें जाण । असंख्य अब्दें[9] ओस वन । यालागीं म्हणती दंडकारण्य । नामाभिधान राजशापें ॥६९॥ भार्गवाच्या शापभयेंसी । पर्जन्य वर्षेना तया देशीं । प्रकाशे ना सूर्य शशी । अहर्निशीं अंधकार ॥७०॥ ऐसेनि अंधकारेंसीं । लोटल्या वर्षानुवर्षी । पुढती वस्ती झाली कैसी । श्रीराम ऋषीसी पूसत ॥७१॥ अगस्ति सांगे श्रीरामासी । वसावया दंडकारण्यासी । नारदें विंध्याद्रीपासीं । महामेरूसी विनविलें ॥७२॥ चराचरासी आधारू । स्वयें जाला महामेरू । मेरूहूनि सधरू[10] । पर्वत थोरू असेना ॥७३॥

मेरू व विंध्याद्री यांची स्पर्धा : ऐकोनियां नारदोक्ती । मेरूचिया स्पर्धास्थितीं । खुंटली शशिसूर्याची गती । विंध्याद्रि ऊर्ध्वपंथीं[11] वाढला ॥७४॥ राहिले स्वाहास्वधाकार[12] । राहिले स्वधर्मकर्माचार । राहिले जपतपोविचार । रविचंद्र नुगवती ॥७५॥ लोपले स्वाहास्वधाकार । मरों टेकले देव पितर । भुकें तळमळती ऋषीश्वर । संध्येवीण आहार सेवूं नये ॥७६॥

विंध्याद्री उंच उंच वाढल्यामुळे सूर्यचंद्रांची गती बंद, म्हणून सर्व कर्मे थंडावली : गोधनें राना न वचती । वत्सें[13] हंबरडा हाणिती । आकांत मांडला त्रिजगतीं । विंध्याद्रि गभस्ती[14] उगवों नेदी ॥७७॥ मग ऋषीश्वर ब्रह्मयाप्रती । अवघे गाऱ्हाणे सांगती । तेव्हां तिन्ही देव विचारिती । जे दक्षिणे अगस्ती धाडावा ॥७८॥

---

शब्दार्थ – १. सुवर्णाचे म्यान असलेले, २. कवच, ३. धारण करणाऱ्याला, ४. रथाची इच्छा, ५. स्वर्गीय शस्त्रे, ६. धडे, मस्तक तुटलेली शरीरे, ७. नद्या व तळी, ८. सर्प, ९. वर्षे, १०. बळकट, ११. उंचीने, १२. देवपितृकर्मे, १३. वासरे, १४. सूर्याला.

अगस्तींना देवांची विनंती : देव सांगती अगस्तीसी । त्यजोनियां वाराणसीसी । नेमावया[1] विंध्याद्रीसी । शीघ्र दक्षिणेसी तुम्हीं जावें ॥७९॥ नेमोनियां विंध्याद्री । तो निजवावा पृथ्वीवरी । अहोरात्रें वाहतीं करीं । शशिसूर्यां करीं मोकळा मार्ग ॥८०॥ थोर पुण्य होईल ऋषी । देव पितर पावती तृप्तीसीं । ब्राह्मण चालविती स्वधर्मासी । हें तुजपासीं सामर्थ्य ॥८१॥ तुझें सामर्थ्य वानावें किती । आचमनें प्राशिला अपांपती[2] । विंध्याद्रि बापुडें तें किती । परोपकारार्थी तुवां जावें ॥८२॥ पुढतीं न करी उत्थान । तैसा विंध्याद्रि नेमून । संस्थापावया देवब्राह्मण । दक्षिणे गमन तुवां कीजे ॥८३॥

अगस्तीचे दक्षिणेला प्रयाण : ऐकोनि देवांचें वचन । म्यां जाणोनि नारदाचें मन । वसवावया दंडकारण्य । माझें आगमन दक्षिणेसी ॥८४॥ ऐकें बापा श्रीरघुपती । माझें आगमन या रीतीं । आलों कोणकोण्या स्थिती । तेहीं तुजप्रती सांगेन ॥८५॥

कस्यचित्त्वथ कालस्य दैवयोगादहं नृप । वाराणसीं परित्यज्य इह प्राप्तोऽस्मि मानद ॥१७॥

मी पर्जन्योदकेंशीं मेघ । आलों घेवोनि अमोघ । सुरकार्य साधावया चांग । आलों सवेग विंध्याद्री ॥८६॥

विंध्याद्रीचे वंदन व त्याला आज्ञा : ऐकें राजचूडामणी । मज येतां तेणें देखोनी । विंध्याद्रि आला लोटांगणीं । यथोक्तपूजनीं पुसता होय ॥८७॥ कोण पां वार्ता उत्तरेसीं । ते मज सांगा जी महाऋषी । तूं येथोनि केउतां[3] जासी । तेंही मजपासीं सांगावें ॥८८॥ कोणते धरोनि अपेक्षेसी[4] । तूं आलासी मजपासीं । ते म्यां दिधलें निश्चयेंसीं । भाक मजपासीं दीधली ॥८९॥ त्यासी उत्तरेची वार्ता । म्यां सांगितली श्रीरघुनाथा । तेहीं तुज मी सांगेन आतां । यथार्थता अनुवादु[5] ॥९०॥ विंध्याद्रि तुझा प्रताप । देखोनि मेरूसी महाकंप । सुरासुरां[6] महासंताप । तुझें स्वरूप अति श्रेष्ठ ॥९१॥ पाहतां या पृथ्वीमाझारीं । विंध्याद्रि तुझी थोरी । वानिजे गा सुरासुरीं । तुझी सरी मेरू न पवे ॥९२॥ ऐसें ऐकोनियां वचन । विंध्याद्रि उल्लासला आपण । पुढतीं[7] घालोनि लोटांगण । मस्तकीं चरण दृढ वंदिले ॥९३॥ तूं आलासी भाग्येकरीं[8] । तुझें गमन कोठवरी । तें मज सांगावें जी निर्धारीं । तेणें अत्यादरीं पूसिलें ॥९४॥ दक्षिणतीर्थयात्रा-विधान । करावया करितों गमन । मज द्यावें मार्गदान । अधरशयन[9] करोनियां[9] ॥९५॥ तुझी निर्धारिता[10] थोरी । वाढी चंद्रसूर्यांउपरी । मज वेंघवेना[11] तेथवरी । शयन करीं गमनार्थ ॥९६॥ माझें ऐकोनियां वचन । विंध्याद्रीनें केले शयन । म्यां केलिया दक्षिणे गमन । तुवां उत्थान न करावें ॥९७॥ तीर्थे करोनि मम यें मागुता । तंववरी त्वां नुठावें पर्वता । भाष्यबंधें[12] नियामकता । करोनि रघुनाथा मी आलों ॥९८॥

विंध्याद्रीला नमविल्यामुळे मार्ग मोकळा : रविचंद्रां मोकळी वाट । द्विजदेवांचे चुकले कष्ट । दिनमान वाहे स्पष्ट । दिधली वाट विंध्याद्री ॥९९॥ माझें होतांचि आगमन । भृगुशाप गेला पळून । देशीं वर्षला पर्जन्य । तृण वृक्ष धान्य वाढलें ॥१००॥ महामेरूच्या वृक्षांसी । म्यां चिंतितां निजमानसीं । तेही वाढले ये देशीं । फळभारेंसीं सफळित ॥१॥ वाहती सरितांचे[13] ओघ । पद्मपुष्पीं[14] पूर्ण तडाग[15] । नाना पक्षिगण अनेग । गज सिंह मृग क्रीडती ॥२॥ मजसवें येवोनियां ऋषी । जाहले दंडकारण्यवासी । कोणी राजा नाहीं या देशीं । म्हणोनि राक्षसीं व्यापिलें ॥३॥ दंडकशापें दंडकारण्य । ते करावया अति पावन । तूं आलासी श्रीरघुनंदन ।

---

शब्दार्थ – १. नियमन करण्याकरिता, २. समुद्र, ३. कोठे, ४. इच्छेला, ५. भाषण, ६. देवांना आणि राक्षसांना, ७. पुनः, ८. मोठ्या दैवाने, भाग्याने, ९. खाली निजून. १०. निश्चय करितां, ११. चढवत नाही, १२. वचनाच्या बंधनाने, १३. नद्यांचे, १४. कमलांनी व फुलांनी, १५. सरोवरे.

राक्षसघ्न[1] प्रतापी ॥४॥ तुझें जालिया आगमन । राक्षस निर्दाळसी संपूर्ण । येथोनि आतां वस्ती जाण । वचन पावन श्रीरामें ॥५॥ श्रीरामक्षेत्र दंडकारण्य । ऐसें गर्जेल पुराण । हाचि प्रयोग ब्राह्मण । अति सज्ञान पढतील ॥६॥ राक्षसनिर्दळणीं विचित्र । श्रीराम करील दुर्धर क्षेत्र । यालागीं म्हणती श्रीरामक्षेत्र । पुराणपवित्र श्रीरामें ॥७॥ ऐसी ऐकतांचि कथा । परमाश्चर्य श्रीरघुनाथा । ऋषिचरणीं ठेविला माथा । होय पुसता वनस्पती ॥८॥

अगस्तींच्या सूचनेवरून दंडकारण्यात पंचवटीत आश्रमाची स्थापना : दंडकारण्यवनीं वसतां । सौमित्रासहित सीता । म्यां वसावें कोठें आतां । तेंही तत्वतां[2] मज सांगें ॥९॥ तुझें वचन ब्रह्मलिखित । तें म्यां करणें निश्चित । ऐसें पुसतां श्रीरघुनाथ । कृपायुक्त ऋषि बोले ॥११०॥ गंगातीराचे निकटीं । अति पावन पंचवटी । तेथें बांधोनि पर्णकुटी । सुखसंतुष्टीं वसावें ॥११॥ पंचवटी गंगातटीं । ऐकतां उल्हास सीतेच्या पोटीं । श्रीरामासी सुखसंतुष्टी । पंचवटी ऐकोनी ॥१२॥ पंचवटीं करितां वस्ती । त्रैलोक्यपावन निजकीर्ती । तूं पावसी गा रघुपती । जाणें निश्चितीं मद्वाक्यें ॥१३॥ ऐकोनि अगस्तीची गोष्टी । श्रीरामें बांधिली शकुनगांठी । लक्षोनियां पंचवटी । उठाउठीं[3] निघाले ॥१४॥ श्रीरामें केलें नमन । ऋषीनें दिधलें आलिंगन । सीतासहित लक्ष्मण । अगस्ति वंदोन निघाले ॥१५॥ आश्रम करावया पंचवटीं । उल्लास लक्ष्मणाचे पोटीं । वेगीं निघाला जगजेठी । श्रीराम दृष्टीं लक्षोनी ॥१६॥ एकाजनार्दना शरण । अगस्तीपासोनि शस्त्रास्त्रग्रहण[4] । श्रीरामें केलें आपण । वनीं निर्दळण राक्षसां ॥१७॥

इति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां अगस्तिश्रीरामदर्शनं अस्त्रग्रहणं नाम पंचमोऽध्यायः ॥५॥ ओंव्या ॥११७ ॥ श्लोक ॥१६॥ एवं ॥१३३॥

## अध्याय सहावा

### कश्यपवंशवर्णन व अमृतहरणासाठी गरुडाचे प्रयाण

॥ श्रीविश्वंभराय नम ॥

अथ पंचवटीं गच्छन्नंतरा रघुनंदनः । आससाद महाकायं गृध्नं भीमपराक्रमम् ॥१॥
तं दृष्ट्वा तौ महाभागौ वनस्थौ रामलक्ष्मणौ । मेनाते राक्षसं गृध्नं ब्रुवाणौ को भवानिति ॥२॥
ततो मधुरया वाचा सौम्यया प्रीणयन्निव । उवाच वत्स मां विद्धि वयस्यं पितुरात्मनः ॥३॥

पंचवटीत संगमावर आश्रमयोजना : पंचवटीं परम प्रयाण । श्रीराम सीता सहलक्ष्मण । अगस्तींसी करोनि नमन । शीघ्र गमन तिहीं केलें ॥१॥ रम्य रमणीय गंगातटीं । पंचक्रोश पंचवटीं । उल्हास तिघांच्याही पोटीं । उठाउठीं निघालीं ॥२॥ अरुणावारुणासंगमप्राप्ती । मीनली[5] प्राची सरस्वती । तीर्थ पावन त्रिजगतीं । आवडे वस्ती श्रीरामा ॥३॥ सुंदर आणि कपाळेश्वर । दोहीं तीरीं मनोहर । तीर्थें पावन परिकर[6] । श्रीरामचंद्रहिवास ॥४॥ पद्मपुरीं निशाचर । वसताती अति दुर्धर । तेणें भये ओस नगर । तीर्थपरिचार[7] खुंटला ॥५॥ त्रिशिरा आणि खर दूषण । ओस करोनियां जनस्थान । राक्षस वसताती दुर्जन । तीर्था कोणी जाऊं न शके ॥६॥ तेथें करावया वस्ती । पंचवटिके सीतापती । स्वयें धाडिला अगस्तीं । राक्षसघातकी श्रीराम ॥७॥ राक्षसांचे कुळनिर्दळण । समूळ करील रघुनंदन । यालागीं पंचवटीस्थान । दिधलें नेमून अगस्तीनें ॥८॥

जटायूचे दर्शन व वृत्तांत समजला : पंचवटीनंतर । श्रीराम चालिला सत्वर । पुढें जटायु गृध्र[8] पर्वताकार । देखिला समोर श्रीरामें ॥९॥ डोळे आरक्त धगधगित ।

शब्दार्थ – १. राक्षसांस ठार मारणारा, २. खरेपणानें, ३. त्वरित, ४. शस्त्रास्त्रविद्यांचें ज्ञान, ५. मिळाली, ६. सुंदर, ७. तीर्थाला जाणें येणे, ८. गरुड.

चांचुवडे[१] समसमित[२] । हा तंव राक्षस असे अद्‌भुत । दोहीं निश्चित मानिला ॥१०॥ धनुष्य सज्जोनि मुष्टीं । दोघे चालिले जगजेठी । रामें हाकिला शौर्यदृष्टी । बाण मुष्टीं ओढी सज्जोनी ॥११॥ राहें साहें धरी धीर । गृध्ररूपिया तूं निशाचर । मार्ग रोधिसी अति दुर्धर । बाणीं सत्वर छेदीन ॥१२॥ माझें सुटलिया कुऱ्हाडें[३] । तुझें पक्षबळ बापुडें । केउता पळसील मजपुढें । रणीं रोकडें पाडीन ॥१३॥ गृध्ररूपी तूं येथें कोण । मार्ग रोधावया काय कारण । समूळ सांगावें निजकथन । प्राण घेईन बोलतां ॥१४॥ मी दाशरथी श्रीरघुनंदन । सीता कांता बंधु लक्ष्मण। पंचवटिके करितों गमन । मार्गरोधन कां केलें ॥१५॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । जटायु घाली लोटांगण । दाशरथी रघुनंदन । तुझें महिमान मी जाणें ॥१६॥ तुझें घ्यावया दर्शन । पंचवटिके वनसेवन । करूं येईल रघुनंदन । बहुकाळ जाण मी तिष्ठत ॥१७॥ तुझा पिता जाण दशरथ । युद्धसखा माझा आप्त । स्वर्गा गेला इंद्रसाह्यार्थ। नमुचिघात[४] जें केला ॥१८॥ मी आकाशीं झडपोनि जाण । दैत्यांचें उडविलें शिरस्राण[५] । दशरथें विंधोनियां बाण । दैत्य दारुण निर्दळिले ॥१९॥ त्याचा तूं तंव ज्येष्ठ सुत । पूर्णब्रह्म श्रीरघुनाथ । तुझी सेवा करावया येथ । आलों निश्चित श्रीरामा ॥२०॥

कश्यपवंशोत्पत्ती : तूं स्वामी मी तुझा दास । दृढ मानावा विश्वास । मज न म्हणावें राक्षस । माझा वंश कश्यपी[६] ॥२१॥ काश्यपवंशीं माझी उत्पत्ति । त्या कश्यपाची वंशस्थिती । मी सांगेन श्रीरघुपति । विश्वासार्थी[७] माझिया ॥२२॥ तूं मज म्हणसी राक्षस । मी राक्षस नव्हे गा कश्यपवंश । माझी वंशावळी बहुवस । सावकाश अवधारी ॥२३॥ मनूपासाव उत्पत्ति जाण । क्षत्रिय वैश्य शूद्र ब्राह्मण । वरकड सृष्टि कश्यपी जाण । तेंही लक्षण ऐकें तूं ॥२४॥ अदितीपासाव झाले देव । दितीचे दैत्य दनूचे दानव । मनूपासूनि झाले मानव । मानवी वैभव मनूचें ॥२५॥ स्वसेपासाव रुद्रोत्पत्ती । जे कां रुद्रगण रुद्रानुवर्ती । भद्रेपासाव गंधर्व जन्मती । जे गायन गाती अति मधुर ॥२६॥ उभयसंध्यामैथुनस्थितीं । येथ राक्षसां जन्मप्राप्ती । यालागीं संध्येपासव उत्पत्ती । ज्ञाते बोलती राक्षसांची ॥२७॥ जे वेदशास्त्रीं अति व्युत्पत्ती । वादीं ब्राह्मण निर्भर्त्सिती । ते ब्राह्मणद्वेषी ब्रह्मराक्षस होती । जाण निश्चितीं श्रीरामा ॥२८॥ रावणा ब्रह्मराक्षसपण । व्हावया हेंचि कारण । तेणें शतसहस्र वेद विभागून । ऋषि सज्जन निभर्त्सिले ॥२९॥ ज्ञानगर्वाची अति गती । ब्रह्मद्वेषाच्या अति युक्ती । ब्रह्म-राक्षसत्वाची प्राप्ती । जाण निश्चितीं श्रीरामा ॥३०॥ क्रोधवशेपासाव देख । सिंधब्याघ्रव-राहादिक । मृग ससे वृक जंबुक । गौरादि अनेक श्वापदें जालीं ॥३१॥ वारणीपासाव उत्पत्ती । जन्म पावला ऐरावती । गजदिग्गजांची प्रसूती[८] । जाण निश्चितीं तिचेनि ॥३२॥ शरमेचें ज्येष्ठ सुत । श्याम शबल यमाचे दूत । श्वानमार्जारादि समस्त । तिचेनि होत श्रीरामा ॥३३॥ वृतेपासाव बहुवस । विद्याधर किन्नर किंपुरुष । तपस्वी दुर्धर असोस । बळें गहिस[९] गरिष्ठ ॥३४॥ जागळेपासाव जाण । वनें उपवनें कंटकी विपिन । वीरुंध[१०] वल्ली औषधी तृण । दुर्धर वन ते व्याली ॥३५॥ उत्पत्ति सुरभीपासोन[११] । तेथें जन्मली कामधेन । गाई बैल आदिकरोन । उत्पत्तिस्थान पशूंचें ॥३६॥ वडवेपासाव[१२] अश्वसंभूती । उच्चैःश्रवा स्वर्ग-संपत्ती । श्यामकर्णादि नाना जाती । अश्वोपत्ति तिचेनि ॥३७॥ तिचे ठायीं दुर्धर । भारवाहक खरोष्ट्र[१३]। जन्म पावले अपार । वेसर[१४] खराश्वयोगें ॥३८॥ गृध्री श्येनी धृतराष्ट्री । शुकी

---

शब्दार्थ – १. चोंच, २. विक्राळ, ३. बाण, ४. नमुचिनामक दैत्याचा नाश, ५. मस्तकावरील कवच, ६. कश्यपाचा, ७. विश्वाचा पटावा म्हणून, ८. उत्पत्ति, ९. अडाणी, १०. डहाळ्या, ११. कामधेनूपासून, १२. घोडीपासून, १३. गाढवें व उंटें, १४. खेचर.

क्रौंची ऐशा पंच नारी । पक्षी जन्मले यांच्या उदरीं । मत्स्यादि मगरी जळचरें ॥३९॥ गृध्रीपासाव गीध घार । उलूक[1] वाघुळा अपार । गंडभैरवादि दुर्धर । अति क्रूर प्रसवली ॥४०॥ श्येनीपासाव जन्मले देख। श्येन तित्तिर लावक । कपोता कोकिळ कुक्कुट काक। सरड बेडूक जन्मले ॥४१॥ जन्मला क्रौंचीच्या उदरीं । ढोंक टिटवी कांकणधारी । भोरड्या जन्मलिया घुमरी । अहोरात्री किळकिळती ॥४२॥ शुक्रीपासाव शुक सारिका । चाप भारद्वाज मयूर देखा । चिडया काळचिडया अनेका । पिंगळा बोलला भविष्योत्तरीं ॥४३॥ धृतराष्ट्रीचे पुत्र चोख । हंस बक कारंडक । चकोर आणि चक्रवाक । मत्स्यादि अनेक जळचरें व्याली ॥४४॥ कद्रूपासाव अनेक। काळ कर्कोटक भुजंग। शेष वासुकि नाना नाग। पाताळपन्नग ते व्याली ॥४५॥ कश्यपापासाव सुरासुर । कश्यपापासाव नर किन्नर । कश्यपापासाव चराचर । सृष्टि समग्र कश्यपी ॥४६॥ अंडज[2] स्वेदज[3] जरायुज[4]। जे कां जन्मले उद्भिज्ज[5]। ते हे कश्यपाचें निजबीज। दुर्धर तेज कश्यपीं ॥४७॥ जळचर भूचर खेचर। जें जें भासे चराचर। तें ते कश्यपी चरित्र। परम पवित्र श्रीरामा ॥४८॥ ज्यांचें नाठवे कुळगोत्र। त्यां कश्यपांत लावित। ते तत्काळ होती पुनीत । जगीं विख्यात कश्यप ॥४९॥ जो कश्यपीं लागला । तो मुक्तीच्या घरासी आला । भुक्तिमुक्तींचा दादुला । वाखाणिला कश्यप ॥५०॥ सृष्टीचा कर्ता सृष्टीचा हर्ता । येव्हढी कश्यपाची सत्ता । यालागीं भुक्तिमुक्तींचा दाता । जाण तत्त्वतां कश्यप ॥५१॥ कश्यपी सृष्टी वर्णीं। ऐसा वक्ता नाहीं कोणी । मी बोलिलों संकळोनी[6]। क्षमा सज्जनीं करावी ॥५२॥

**जटायू हा कश्यपाचा नातू :** त्या कश्यपाचा मी नातू । जटायुनामे विख्यातू । ऐक माझा वृत्तांतू । समूळ साद्यंतू[7] सांगेन ॥५३॥ कश्यपासी बहुत पत्नी । मुख्य अदिती दिती दनी । चौथी माझ्या पित्याची जननी । विनतानाम्नी पतिव्रता ॥५४॥

**कश्यपाची भार्या विनता, तिचे मुलगे अरुण व गरुड व अरुणाचे दोन पुत्र जटायू व संपाती :** विनतेचे दोघे कुमर । अरुण आणि गरुड सुपुत्र । भगवद्भजनीं अति पवित्र । त्यांचे चरित्र अवधारीं ॥५५॥ अरुण रविरथीं सावधान । गरुड श्रीविष्णूचें वाहन । गरुडाची ख्याति अति गहन । अमृत हिरोन आणितां ॥५६॥ गरुडें जाणोनि आपण । कां केलें अमृतहरण । ऐसें पुसतां श्रीरघुनंदन । समूळ कथन जटायु वदे ॥५७॥

**अमृतहरणाची पूर्वकथा, विनता व कद्रूमध्ये पैज :** विनता कद्रु दोघी सवती । सवतीमत्सराच्या छळणोक्तीं । कद्रु पुसे विनतेप्रती । सूर्याचे रथीं वारू कैसे ॥५८॥ विनता म्हणे वारू धवळ[8]। कद्रु म्हणे वारू सुनीळ । बोलतां बोलतां वाढलें सळ[9]। पैजेचा प्रबळ पण केला ॥५९॥ कद्रु म्हणे श्वेत वारू जरी । तरी घडा घेवोनिया शिरीं । दिव्य सहस्र वर्षेंवरी । पाणी तुझ्या घरीं वाहीन ॥६०॥ विनता बोले तये काळीं । जैं वारुवांची[10] प्रभा निळी । तैं मी घेवोनि घागरी चुंबळी । दिव्याब्दमेळीं[11] जळदासी तुझी ॥६१॥ दोघींचें परम प्रमाण । भाषाबंधें[12] केला पण । कद्रूनें करावया छळण । कपट संपूर्ण मांडिलें ॥६२॥

**कद्रूसाठी सूर्याच्या घोड्यांचा रंग विषप्रयोगाने निराळा करणे :** अरुणें सांगितलें विनतेसी । श्वेत वारू सूर्यरथासी । त्याचा अति विश्वास तिसी । विकल्प मानसीं असेना ॥६३॥ कद्रु सर्पांतें पुसे । सूर्यरथी वारू कैसे । ते सांगती शुभ्र वेषें । मग कद्रु मानसें अति दुःखी ॥६४॥ पुत्रांसी सांगे पणाची थोरी । दिव्य सहस्र वर्षेंवरी । मी दासी जालें विनतेघरीं । जळपरिचारी जळदासी ॥६५॥ नकळतां निजनिर्धारू । त्वां कां नेमिलें[13] निळे वारू । करितां

---

शब्दार्थ - १. घुबड, २. अंड्यापासून झालेले, ३. घामापासून झालेले, ४. वारेपासून झालेले, ५. वनस्पती, ६. संक्षेपाने, ७. अथपासून अखेरपर्यंत, ८. पांढरे, ९. भांडण, १०. देवांच्या, ११. देवांचे वर्ष होईपर्यंत (एक हजार वर्षे), १२. शपथ देऊन, १३. ठरविले.

सवतीमत्सरू । मत्सरें दुस्तरू भोग आला ॥६६॥ विनता सती पतिव्रता । तू कां मत्सरू करिसी वृथा । मत्सरें दासीत्व बैसलें माथां । त्यासी काय आतां चालेल ॥६७॥ न करा मातेचा कैवार । पुत्र जन्मलेति तुम्ही पाथर । अवघे झोंबोनि विखार । निळे सत्वर करा वारू ॥६८॥ सर्प म्हणती करितां कपट । होईल अवघियांचें तळपट । वंश[1] होईल सपाट । करितां कपट भलें नव्हे ॥६९॥ ऐकोनि पुत्रांचे वचन । कद्रु झाली कोपायमान । मग शाप दिधला दारुण । अग्निदहनें भस्म व्हाल पैं ॥७०॥ तंव सर्प झोंबोनि सकळ । विषें वारू केले सुनीळ । मग मातेसी सांगती उतावेळ । दावीं तूं तत्काळ विनतेसी ॥७१॥ विलंब करितां या कार्यासी । सूर्य शोषील या विषासी । मग दाविल्या विनतेसी । जयो आहांसी पैं न ये ॥७२॥ कापट्याच्या कृतकार्यासी । तत्काळ साधावें वेगेंसीं । विलंब करितां कपटासी । जयो आम्हांसी पैं नाहीं ॥७३॥

कपटाचा उपयोग केल्यामुळे विनता पण हरते: पुत्रवचनें उतावेळ । कद्रु विनता आणी तत्काळ । सूर्यरथींचे वारू सुनीळ । देख समूळ नीळवर्ण ॥७४॥ कद्रु म्हणे विनतेसी । म्यां जिंतलें निजपैजेसी । तू जालीस माझी दासी । अति उल्लासीं आली घरा ॥७५॥ आल्हाद देखोनि मातेसी । सर्प मागती उ:शापासी । कद्रु हरिखली मानसीं । उ:शापासी स्वयें वदे ॥७६॥ कन्या जरत्कारीचे उदरीं । जरत्कारवीर्येंकरीं[2]। आस्तीक जन्मेल ब्रह्मचारी । तो शापजोहरीं[3] रक्षील ॥७७॥

कद्रूचा शाप व उ:शाप : दुर्धरशापाग्नीआंत । सर्प जळतां समस्त । आस्तीक पावोनियां तेथ । देह दहनांत[4] रक्षील ॥७८॥ मातृपक्षाचें कुळ सकळ । शापाग्नींत जळतां मातुळ । आस्तीक रक्षील तत्काळ । तपोबळप्रतापें ॥७९॥ उ:शापें तुष्टली माता । तेणें आल्हाद सर्पां समस्तां । कद्रूसी परम चिंता । सुख सर्वथा असेना ॥८०॥

कद्रू सचिंत : कपटे जिंतिली विनता । कपट करील पुत्रघाता । ते कद्रूसी दुस्तर चिंता । सुख सर्वथा असेना ॥८१॥ जरी कपटें जय पावला कपटी । तरी धाकें धुकधुकी पोटीं । कपटघातकी शेवटीं । कपटें कपटी अति दु:खी ॥८२॥ निजकपटाची अति चिंता । बैसली कद्रूचिया माथां । पुढें विनतेची कथा । बंधमोचनता अवधारा ॥८३॥ विनता पुसे अरुणाप्रती । श्वेत वारू सूर्याचे रथीं । त्वां कां सांगितलें मज निश्चितीं । नीळप्रतीति[5] मज आली ॥८४॥ नीळिमा[6] चढला आश्वांसी । तेणे मी जालें कद्रूची दासी । घडा घेवोनियां शिर्सी । अहर्निशीं जळ वाहीं ॥८५॥ तंव अरुण म्हणे सर्पी देख । चढवोनियां निजविष । निळे वारू केलें नि:शंक । परी कपटें दु:ख पावती ॥८६॥

सूर्यकोपामुळे सर्पांचे पक्ष व पादच्छेदन । सुनीळ देखोनि वारूसी । कोप आला सूर्यासी । मग उपटोनि सर्पांच्या पंखांसी । आणि पायांसी निवटिलें ॥८७॥ पूर्वीं पक्ष होते सर्पांसी । गोमीच्या ऐसे प्रम्य त्यांसी । सूर्य कोपोनि मानसीं । पक्षपायांसी छेदिलें ॥८८॥

उरग व श्यामकर्ण : पाय निवटिल्या मग । उरें चलों लागले नाग । यालागीं त्यांसी उरग । हा दु:खभोग कपटाचा ॥८९॥ सूर्ये शापिलें सर्पांसी । उदरीं धरिलें कपटासी । तोचि उदरशूळ तुम्हांसी । अहर्निशीं भोगाल ॥९०॥ मुकले पक्षां आणि पायांसी । उदरीं शूळ अहर्निशीं । कपटाची दशा ऐसी । कपटापासीं अति दु:ख ॥९१॥ इतुकें जालें उठाउठीं । तरी कपट न

---

शब्दार्थ - १. नाश, २. जरत्कारूपासून, ३. शापरूपी अग्नीप्रलयांत, ४. अग्नीमध्ये, ५. निळे असल्याचा अनुभव, ६. काळेपणा.

सोडी पाठी । आगीं घालील शेवटीं । कपटें कपटी अति दुःखी ॥९२॥ सूर्यें अश्वविष आकशून । कर्णीं राखिलें निर्विष करून । तेणें जाले शोभायमान । श्यामकर्ण जगद्वंद्य ॥९३॥ तैंपासोनियां जाण । वारू जाले श्यामकर्ण । जगीं यागीं अति पावन । शोभायमान तिहीं लोकीं ॥९४॥ अरुण सांगे मातेप्रती । मजअधीन सूर्याची गती । मी जेवोनियां बैसेन रथीं । बंधनिर्मुक्ति गरुडाधीन ॥९५॥ आकळावया त्रिजगती । गरुडापासीं सामर्थ्यशक्ती । त्याचे अंगीं सहिष्णुता शांती । बंधनिर्मुक्ती तो करील ॥९६॥ सूर्याची आज्ञा मज तत्वतां । उदयीं वंदावीं मातापिता । म्हणोनि आलो मी वंदनार्था । जाईन मागुती रथगती ॥९७॥ बंधमोचन गरुडाहातीं । बुद्धि सांगोन मातेप्रती । अरुण बैसला सूर्यरथीं । मातृभक्ति गरुडा गाढी ॥९८॥ विनता सांगे गरुडापासीं । कपटें जिंतोनि पैजेसीं । कद्रूनें मज केलें दासी । सहस्र वर्षी जळ वाहीं ॥९९॥ अरुणें सांगितलें मजप्रती । बंधमोचन गरुडाहातीं । तरी करिसील कैसी युक्ती । ते यथार्थ गती मज सांगें ॥१००॥ तेव्हां गरुड क्षोभला उद्भट । तुज जिंतिलें करोनि कपट । कपटें कपटियाचें तळपट । करीन सपाट सर्पाचें ॥१॥ मातेसी द्यावया समाधान । कोप केला उपशमन[1] । वंदोनि मातेचे चरण । काय वचन बोलत ॥२॥

सुटका करण्यासाठी कद्रूकडून अमृताची मागणी : तुझ्या बंधमोचनासी । पालट[2] पुसें तूं कद्रूसी । जरी मागेल उत्तम पदार्थासी । तरी मी आणून तिसी देईन ॥३॥ मातृबंधमोचनार्थ । अति दुर्लभ मागेल अर्थ । तो तो देईन पदार्थ । मोचनार्थ[3] पुसें वेगीं ॥४॥ मग विनता सांगे स्वयें कद्रूसी । गरुडें पाठविलें तुजपासीं । पालटु बंधमोचनासी । जें मागसी तें देईन ॥५॥ निजमातेच्या बंधमोचनीं । कल्पतरु चिंतामणी । देईन कामधेनु आणोनी । आवडे मनीं तें मागें ॥६॥ मग कद्रु विचारी चित्तीं । परम सामर्थ्य गरुडाप्रतिही । अति उद्भट याची शक्ती । अमृतप्राप्ती त्या मागूं ॥७॥ माझेनि माझ्या पुत्रां शापबंधन । तिहीं केलिया अमृतपान । मग न बाधी जरा जन्ममरण । निर्धारोन तेंचि मागूं ॥८॥ कद्रु सांगे विनतेपासीं । निश्चयें पुसावें गरुडासी । परमामृत देवविसी । तैं तूं होसी बंधमुक्त ॥९॥ माझे पुत्र पाताळवासी । अखंड राखण अमृतासी । तरी प्राप्ति नाहीं त्यांसी । तें तू देसी तैं मुक्त ॥१०॥

पाच प्रकारचे अमृत : स्वादामृत उन्मादामृत । सुप्तामृत तृप्तामृत । यें अमृतें प्रलोभार्थ[4] । परमामृत पांचवें ॥११॥ स्वादामृत अप्सरांसी । तेणें त्या स्वादिष्ठ सर्वांसी । तृप्त्यमृत तें देवांसी । क्षुधा त्यांसी बाधेना ॥१२॥ उन्मादामृत दैत्यांसी । तेणें ते उन्मत्त अहर्निशीं । सुष्प्यामृत[5] तें दिग्गजांसी । तेणें सुखेंसीं डुलत ॥१३॥ डुकल्या येती निद्रिस्थांसी । तेंवी डुल्लणें दिग्गजांसी । ये तंव अमृतें वायसी[6] । देवें सर्वांसी चाळविलें ॥१४॥ समुद्र मंथिला समस्तीं । जाली अमृताची प्राप्ती । कलहो करितां देवीं दैत्यीं । मोहिनीहातीं दीधलें ॥१५॥ मोहिनीरूपें श्रीविष्णू जाण । तेणें अमृत विभागून । इतरां अमृत वाढोन । राखिलें आपण परमामृत ॥१६॥ जेणें चुके जरा मरण । तें परमामृत विष्णुअधीन । तें जैं देसील आणून । बंधमोचन तैं तुज ॥१७॥ ऐकोनि कद्रूची कथा । गरुडापासीं आली विनता । आणोनि द्यावें परमामृता । बंधमोचनता तैं मज ॥१८॥

अमृतहरणासाठी गरुडाचे प्रयाण, कश्यपांचा शुभाशीर्वाद : परिसोनि मातेचें वचन । तिचें करावया बंधमोचन । वंदोनि मातेचे चरण । अमृतार्थीं आपण उडों पाहे ॥१९॥ तंव कृपा

---

शब्दार्थ - १. शांत, २. बदली पदार्थ, एका ऐवजी दुसरी वस्तू, ३. सुटकेबद्दल द्यावयाची वस्तू, ४. फसविण्यासाठी, ५. झोप आणणारे अमृत, ६. लटक्या.

उपजली मातेसीं । मग हातीं धरिलें गरुडासी । आणिलासें कश्यपापासीं । वृत्तांत त्यासी सांगितला ॥१२०॥ मातृभक्ति गरुडासी । देखोनि सुख कश्यपासी । कृपें अभिषेकून त्यासी । धरी पोटीं स्वानंदें ॥२१॥ हरिखें वर देत त्यासी । प्रतापें पावसी परमामृतासी । युद्धीं विष्णुभक्त होसी । मुक्त करिसी निजमाता ॥२२॥ परमामृत विष्णूआधीन । त्याचें करावें नामस्मरण । नामापासीं विजय पूर्ण । निश्चयें जाण हरिभक्तां ॥२३॥ अच्युतनामाच्या आवृत्ती । तयां प्रळयीं[1] नव्हे च्युती[2] । अच्युतपदाची निजप्राप्ती । युद्धसामर्थ्यी पावसी ॥२४॥ ऐसी कश्यपें परम कृपा करूनी । अच्युतनाम उपदेशूनी । गरुड धाडिला अमृतहरणीं । नामस्मरणीं निजविजयो ॥२५॥ मातापित्यासीं करोनि नमन । तीर्थ घेतलें प्रार्थून । हरिनामीं नित्य सावधान । क्रमावया गगन आल्हादें ॥२६॥ नकुळा दासी विनतेघरीं । नकुळ[3] जन्मला तिचे उदरीं । तो गरुडासी साहाकारी । होऊनि सर्पारि चालिला ॥२७॥ आरंभूनि त्या दिवसासी । वर सर्पामुंगसांसीं । भेटी होतां येरयेरासी । निजप्राणांसी सर्प सांडी ॥२८॥ मुखीं नामाची आवृत्ती । गरुड निघाला अमृतार्थी । कश्यपउपदेशाची युक्ती । विष्णुप्राप्ती संग्रामीं ॥२९॥ एकाजनार्दना शरण । करितां श्रीरामनामस्मरण । भगवत्प्राप्ति अलोट ज्ञान । हें महिमान नामाचें ॥१३०॥ नामापासीं भुक्तिमुक्ति । नामापासीं यश[4] कीर्ति । नामापासीं विजयप्राप्ति । कर्मनिर्मुक्ति हरिनामें ॥३१॥ नामापासीं नित्य निवृत्ती । नामापासीं नित्य शांती । नाम वंदिजे सर्वांग मतीं । ब्रह्मप्राप्ति हरिनामें ॥३२॥ एकाजनार्दना शरण । नामें पातकी परम पावन । नामें प्रपंच ब्रह्मपूर्ण । नाम तें जाण परब्रह्म ॥३३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां कश्यपवंशवर्णनगरुडपरमामृताभिगमनं नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥ ओंव्या ॥१३३॥ श्लोक ॥२॥ एवं ॥१३५॥

## अध्याय सातवा

### जटायूसह श्रीरामांचे पंचवटीत आगमन

**अमृतरक्षणासाठी घेतलेली दक्षता :** श्रीरामकृष्णाय नमः ॥ अच्युत नाम धरोनि मानसीं । गरुड निघाला अमृतासी । भावें वंदितां कश्यपासी । साह्य सप्तऋषी त्यासी जाले ॥१॥ गरुडें अतिक्रमोनि गगन । सूक्ष्मरूप धरोनि जाण । परमामृत लक्षितां पूर्ण । तंव बहु रक्षण अमृतासी ॥२॥ प्रथम सर्पांचें संपूर्ण । दुसरें रक्षण वरुण । तिसरें जाण यक्षगण । मरुद्गण तें चवथें ॥३॥ पांचवें रक्षण यमदूत । सहावें रक्षण शिवदूत । सातवें रक्षण विष्णुदूत । सावचित्त सर्वदा ॥४॥

**योग्य वेळी गरुडाचे आक्रमण :** गरुडें साधोनयां सवडी । कुंडीं घालोनियां उडी । अमृत शोपोनियां तांतडी । अति झडाडी निघाला ॥५॥ तंव झाला हाहाकार । पक्षी नव्हे ह्य अमृतचोर । क्रोधें उठिले विखार । शस्त्रसंभार सूटले ॥६॥ गरुडपंखांच्या झडाडीं । राखणीं मूर्च्छित बापुडीं । शस्त्रें पडती उबडी[5] । सर्प कडाडी धाविन्नले ॥७॥ रागें क्षोभता विखारीं । नखाग्रघायीं त्यां विदारी । नकुळ पावला साहाकारी । सर्प माझारीं छेदित ॥८॥ तंव वरुणें घालोनि पाशांसी । गरुड आकळिला पक्षेंसीं । नकूळें करांडूनि[6] पाशांसी । केलें गरुडासी निर्मुक्त ॥९॥

**गरुडाने वाटेत येणाऱ्या देवांना स्वसामर्थ्याने पराभूत केले :** गरुडें झडपोनियां वरुणासी । उडविला

---

शब्दार्थ - १. सर्व जगाच्या विनाशकाली, २. नाश, ३. मुंगूस, ४. भवपाशातून मुक्तता, ५. उपडी, ६. तुकडे पाडून.

तो आकाशीं । भोंवडोनि दाही दिशीं । पडे पृथ्वीसीं मूर्च्छित ॥१०॥ राखणाईत आपापरीं । विदारले नखाग्री । नकुळ केवळ सर्पारी[1]। नानापरी छेदिले ॥११॥ ऐसें करोनि रणकंदन । गरुड वळंघला[2] सर्प गगन । करोनियां अमृतपान । बळवाहन[3] चालिला ॥१२॥ हाक वाजिन्नली वैकुंठीं । कोपें चालिला धूर्जटी[4] । देवांच्या कोट्यनुकोटी । अमृतासाठीं धांविन्नल्या ॥१३॥ वेगीं बैसोनि सुरगजासीं । इंद्र धांविन्नला वेगेंसीं । वज्र हाणितलें गरुडासीं । येरें वज्रासी गिळिलें ॥१४॥ गरुडपंखांच्या झडाडीं । इंद्राची वळली मुरकुंडी । गज पळाले कडाडीं । देवांच्या कोडी पळाल्या ॥१५॥ गरुडपंखांचा पवन । देवां नाठवे निजस्थान । वाहुटुळीमाजी रज:कण । तैसे सुरगण भ्रमचक्रीं ॥१६॥ यम धांविन्नला कोपेंशीं । दंडें हाणितलें गरुडासी । तेणें गिळिलें यमदंडासी । मग यमासी दंडिलें ॥१७॥ यमें जाचिलें बहुतांसी । गरुडें गांजिलें यमासी । करोनियां कासाविसी । यम धुळीसीं मेळविला ॥१८॥ यम गांजला नानापरी । कोण धांवेना कैवारी । देखोनि कुबेर पळे दूरी । सौजन्य करी गरुडासीं ॥१९॥ बंधमोचन मातेसी । अमृत द्यावया कद्रूसी । धाडीन मणिमय कलशासी । अमृतासी सांठवण ॥२०॥ गरुडपंखांचे झडाडीं । दिग्गजें रानीं पळालीं बापुडीं । सुरासरांचिया कोडी । देशोधडी केलिया ॥२१॥ दैत्य दानव महाबळी। तेही मारिले रणकल्लोळी । धाकें सर्प गेले पाताळीं । आतुर्बळी विनतात्मक[5] ॥२२॥ मंत्रपूतजळशक्ती । युद्धा आला प्रजापती । तंव कमंडलु हिरोनि हातीं । अच्युतशक्ति गिळियेला ॥२३॥ पित्याच्या पित्याचा पिता । भीड राखिली धर्मार्था । येरवीं गरुड घोळसिता । घडी न लगतां ब्रह्मयासी ॥२४॥ महादेवें क्रोधानळीं । गरुड हाणितला त्रिशूळीं । गरुड त्रिशूळातें गिळी । शिव ते वेळीं विस्मित ॥२५॥ त्रिशूळ गिळावयाची शक्ती । हें कैंची या गरुडाप्रती । सदाशिव पाहे निश्चितीं । हृदयस्थित श्रीराम ॥२६॥ श्रीरामनामाच्या निजस्थितीं । गरुडें जिंतिली त्रिजगती । त्रिशूळ गिळावया ती शक्ती । जाली निश्चितीं श्रीरामनामें ॥२७॥ हृदयीं अमृत मुखीं रामनाम । त्यासीं कोण करी संग्राम । खुंटला शिवाचा पराक्रम । श्रीरामनाम परिसोन ॥२८॥ ऐकतां श्रीरामाचें नाम । सदाशिवासी आलें प्रेम । मूर्च्छित पावला विश्राम । युद्धसंग्राम विसरला ॥२९॥ गरुडें कश्यपाच्या उपदेशीं । नामें जिंतिलें सदाशिवासी । कळिकाळाची गति कायसी । हरिभक्तांसी बाधावया ॥३०॥ निजभक्तासी द्यावयाचा भेटी । विष्णू पावला उठाउठीं । चक्र हातवसूनियां[6] मुष्टीं । कृपादृष्टि पैं आला ॥३१॥

श्रीमहाविष्णूचे आगमन : लौकिकी दावी युद्धक्रम । परी भक्ताचे आवडे प्रेम । गरुड स्मरे नित्य नाम । पुरुषोत्तम तुष्टला ॥३२॥ जो सप्रेम स्मरे नाम । त्याअधीन पुरुषोत्तम । नामें संतुष्ट आत्माराम । भक्तकाम कृपाळु ॥३३॥

श्रद्धया हेलया नाम स्मरंति मम जतवः ॥ तेषां नाम सदा पार्थ वर्तते हृदये मम ॥१॥

श्रद्धें हेलया[7] जो स्मरे नाम । त्याचें मी हृदयीं वाहें नाम । नामनिष्ठाचे[8] पुरवीं काम । नामें सुगम मत्प्राप्ति ॥३४॥ अमृत सोडवावया बळी । चक्र मोकली[9] वनमाळी । गरुड चक्रांतेहीं गिळी । विस्मय सकळीं मानिजे ॥३५॥ दैत्यदानवमंडळीं । विष्णुचक्र सगळें गिळी । ऐसा कोणी नाहीं बळी । आतुर्बळी हा गरुड ॥३६॥ विष्णुचक्राचा महामार । घायें निर्दाळीत असुर । चक्र त्रैलोक्यीं दुर्धर । गरुडें तें चक्र गट्ट केलें ॥३७॥ स्मरतां राम हरि गोविंद । नामापासीं परमानंद । त्यासी बाधूं न शके द्वंद्व । द्वंद्व[10] निर्द्वंद्व हरिनामे ॥३८॥ नित्य नामाचा

---

शब्दार्थ - १. सर्पशत्रू, २. चढला, ३. बळ हेच वाहन ज्याचे तो, ४. शंकर, ५. गरुड, ६. हातात घेऊन, ७. लीलेने, सहज, ८. नामावर पूर्ण श्रद्धा असलेल्याचे, ९. सोडी, १०. शीत-उष्ण, सुख-दु:ख इत्यादी परस्परविरुद्ध गोष्टी.

निजगजर । त्याअधीन चक्रधर । भक्तां बांधू न शके चक्र । हरि साचार त्यांपासीं ॥३९॥ नाम स्मरतां निरंतर । तयापासीं अहोरात्र । घरटी करी विष्णुचक्र । विघ्न दुर्धर निवटावया ॥४०॥

गरुडाचा पराक्रम पाहून त्याला वर देण्याचे वचन : देवा भक्ता नाहीं अंतर । त्यांपासीं तो निरंतर । यालागीं बाधूं न शके चक्र । चक्र दुर्धर अभक्तां ॥४१॥ माझें निजचक्र गिळोन । गरुडा विजयी तूं संपूर्ण । विष्णु म्हणे मी सुप्रसन्न । माग वरदान वेगेंसीं ॥४२॥ ज्या ज्या वरदाना मागसी । तें तें देईन अति उल्हासीं । ऐकोनि हासें आलें गरुडासी । काय विष्णूसी बोलत ॥४३॥ तुवां जिंतिलें नाहीं मातें । वर देसी कोण्या अर्थें । मीच प्रसन्न जालों तूतें । मागसी तें देईन मी ॥४४॥ कश्यपगुरूचा हात माथां । तुझें अच्युत नाम नित्य स्मरतां । मज काय आहे अपूर्णता । मागसी आतां तें देईन मी ॥४५॥ ऐसें ऐकोनि गरुडवचन । भाष्यवंधेंसीं[१] गोंवून । विष्णु मागे वरदान । सावधान अवधारा ॥४६॥ तरी गरुडा होई माझें वाहन । नुल्लंघावें माझें वचन । नित्य व्हावें मजअधीन । हें वरदान मज देईं ॥४७॥ ऐकतां विष्णूचें मागणें । गरुड विचारी निजमनें । भाष्य देवोनियां न देणें । निंद्य जिणें तिहीं लोकीं ॥४८॥ मिथ्या करितांचि भाक[२] । देव पितर नित्य विमुख । ऐहिकीं[३] परत्रीं[४] काळें मुख । नरकदुःख मिथ्यात्वें ॥४९॥ मिथ्या बोलती वितंड । नरका वचती ते षंढ । त्यांचें मुखचि नरककुंड । पाहों नये तोंड तयांचे ॥५०॥ मिथ्या अनुवादाची घाणी । तिहीं लोकीं उठे पोहणी[५] । पितर विमुख मुख देखोनी । मिथ्या वाणी तो नरक ॥५१॥ ऐसिऐसिया उपपत्ती । गरुडें विचारोनि चित्तीं । जीवित्य द्यावें विष्णूच्या हातीं । केवळ निश्चितीं निर्धारू ॥५२॥ शरीर विष्णूचें वाहन । जीवें नुल्लंघी विष्णुवचन । काया वाचा मनें विष्णुअधीन । तेणें पावन तिहीं लोकीं ॥५३॥ ऐसा करितां निर्धारू । हृदयीं प्रकटला सद्गुरू । विवक प्रकाशिला सधरू[६] । कृपाळु गुरु तो ऐका ॥५४॥ स्मरतां कश्यपाचें वचन । विष्णू परमात्मा ब्रह्म पूर्ण । हे गरुडासी बाणली खूण । समाधान गुरुवाक्यें ॥५५॥ गुरुवाक्यबोधस्थितीं । सकळ भयांची निवृत्ती[७] । गुरुवाक्यें यशकीर्ती । विजयाप्राप्ति गुरुवाक्यें ॥५६॥ तें गुरुवाक्य निर्धारितां । विष्णु चाळकु निजचित्ता । विष्णु इंद्रियांतें नेमिता । सर्व सत्ता विष्णूची ॥५७॥ जगीं विष्णूचि एकात्मता । तेथे मी देता तो मागता । हें तंव न घडे तत्वतां । सर्व सत्ता विष्णूची ॥५८॥ ऐसें विचारोनि चित्ता । विष्णुचरणीं ठेविला माथा । मज अर्पितां नार्पितां । तुज अधीनता सर्वस्वें ॥५९॥ माझें सत्त्व तत्त्व तूं आपण । माझें जीवन तूं परिपूर्ण । माझें जे कां मीपण । तेंही तूं संपूर्ण महाविष्णु ॥६०॥ गोडी साखर दोनी एक । तैसा तूं स्वामी मी सेवक । मज तुज नाहीं वेगळिक । भिन्नत्व देख वर्ततां ॥६१॥ श्रीविष्णूचा निजसेवक । म्हणतां गरुडासी परम हरिख । मज तुझे सेवेचें परम सुख । दृष्टिसन्मुख मज राखावें ॥६२॥ पाहतां तुझें श्रीमुख । फिकें होय समाधिसुख । चरणीं ठेविला मस्तक । दृष्टिसन्मुख मज ठेवीं ॥६३॥ ऐकोनि गरुडाचें वचन । विष्णु झाला संतुष्टमान । दृष्टीपुढें नित्यस्थान । दिधलें नेमून गरुडासी ॥६४॥ गरुडें पृष्टी दिधली देवासी । देवें दृष्टी दिधली गरुडासी । उल्हास देवभक्तांसी । गरुड हरिसेवेसी विनटला[८] ॥६५॥ गरुड विनटोनि श्रीहरीं । काया वाचा मनेंकरीं । जाला विष्णूचा आज्ञाधारी । जोडिल्या करीं तिष्ठत ॥६६॥ देवा भक्तां जालें युद्ध । युद्ध नव्हें तो महाबोध ।

शब्दार्थ – १. वचनात, २. वचन, ३. इहलोकी, ४. परलोकी, ५. चर्मकुंड, ६. बळकट, ७. नाश, ८. तत्पर झाला, लागला.

एकाजनार्दनीं विनोद । परमानंद रणरंगीं ॥६७॥ विष्णु म्हणे खगेश्वर । तूं माझा आज्ञाधार । तरी गिळिला जो शस्त्रसंभार[1] । तो द्यावा सत्वर शिवादिकां ॥६८॥ जीं शस्त्रें त्रैलोक्यीं दुर्धर । साहूं न शकती सुरासुर । काळ कांपें अहोरात्र । तीं त्वां समग्र गिळियेलीं ॥६९॥ दंड त्रिशूळ वज्र चक्र । शस्त्रें गिळिलीं अति दुर्धर । जाले यशाचे डोंगर । कीर्तिसागर त्वां भरिले ॥७०॥ शूर वीर तूं धैर्यलाठा[2] । श्रेष्ठ यश तुझा वांटा । त्याही यशाच्या बांधल्या मोठा । सुरवरिष्ठां देई शस्त्रें ॥७१॥ उभय पक्षांचा[3] आक्रम । तुज शस्त्रांचे नाहीं काम । अदट[4] दाटुगा पराक्रम । शस्त्रें सुरोत्तम गौरवीं ॥७२॥ यशःकीर्तीच्या उत्तरीं । गरुड गौरविला श्रीहरीं । तेणें तो लोळे पायांवरी । आज्ञा शिरीं वंदिली ॥७३॥ यमासि दंड इंद्रासी वज्र । त्रिशूळें पूजिला श्रीशंकर । चक्रें पूजिला चक्रधर । गरुडें समग्र सुखी केले ॥७४॥ पाचारोनियां प्रजापती । कंमडलु दिधला त्याचे हातीं । अवघे जयजयकार करिती । आलिंगिती गरुडातें ॥७५॥ पुढील अमृताची कथा । इंद्र सांगे विव्हलता । सर्पां अमृत पाजितां । होईल तत्वतां तें विष ॥७६॥ सर्पांसी पाजिलिया पीयूष[5] । तेंही परतें होय विष । अमृतावांचोनियां देख । निःशेख[6] मरतील ॥७७॥ सुरवरांची हरावया भूक । देवें निर्माण केलें पीयूख । तें सर्पामुखीं होतांचि विष । अमर निःशेष मरतील ॥७८॥ अमृत दिधलिया सर्पांसी । स्वर्गस्थ मरतील उपवासीं । यालागीं युद्ध केलें गरुडासीं । बळें अमृतासी हरावया ॥७९॥ तंव येणें उभयपक्षमेळीं । मर्दोनि सुरासुरांची फळी । शस्त्रें गिळोनियां सगळीं । निघे तत्काळीं अमृतासी ॥८०॥ तंव विष्णु सुबुद्धि तत्वतां । युद्धी गरुड न जिंकितां । त्यासीं केली दृढ आप्तता । सुरकार्यार्था साधावया ॥८१॥ विष्णूनें थोर ख्याति केली । गरुड जो कां आतुबळी[7] । तो आकळोनि निजबोलीं । शस्त्रें देवविली आम्हांसी ॥८२॥ घालागीं बोलावया निश्चितीं । आम्हांसी जाली उपपत्ती[8] । तोचि श्रीविष्णु अमृतार्थी । सांगेल युक्ती गरुडासी ॥८३॥ अमृतावांचोनि निश्चितीं । अमर मरणातें पावती । तेव्हां गरुडाची यशःकीर्ति । तेचि अपकीर्ति होईल ॥८४॥ ऐकोनि इंद्राच्या वचनासी । विष्णु बुद्धि[9] सांगे गरुडासी । जेणें साधे दोन्हीं कार्यांसी । तें तुजपासी सांगेन ॥८५॥ मातेचें व्हावया बंधमोचन । सर्पा न घडे अमृतपान । तैसें सांगेन विंदान । सावधान अवधारीं ॥८६॥ सर्पांसी कळों न देतां । कद्रूसी[10] द्यावें अमृता । अशुचिदोषें[11] होईल गुप्तता । होवोनि सुस्नाता अमृत घेईं ॥८७॥ अमृतकलश गंगातीरीं । म्यां ठेविलासें दूर्वांकुरीं । मातृबंधमोचन करीं । भावें नमस्कारीं कद्रूतें ॥८८॥ तुवां करितांचि नमन । कद्रु सवेचि संतोषोन । करील मातेचें बंधमोचन । उत्तीर्ण म्हणोन तूं जाईं ॥८९॥ पुढें सर्पांसी अमृतपान । करूं न देती सुरगण[13] । काकस्वरूपें झडपोन । नेती आपण अमृतकुंभा ॥९०॥ ऐसी विष्णूची युक्ती । गरुडासी सांगे दैवी गती । तेचि गरुडें धरोनि चित्तीं । कद्रूप्रती पैं आला ॥९१॥ कुबेर दे रत्नकुंभासी । अमृतें भरोनियां त्यासी । गरुड आला कद्रूपासी । कद्रु गरुडासीं तुष्टली ॥९२॥ गरुडें पाचोरोनि माता । कद्रूपासीं अमृत देतां । बंधनिर्मुक्त विनता । उल्हासतां[14] तरी कद्रु ॥९३॥ म्हणे धन्य विनतेसी । गरुड जन्मला तुझिये कुशीं । घेवोनि आला अमृतासी । मुक्त मातेसही येणें केलें ॥९४॥ ऐकोनि कद्रूचें वचन । गरुड सांष्टागें करी नमन । कद्रूनें गरुडा आलिंगन । आशीर्वचन निजविजयी ॥९५॥ अशुचि स्पर्शतां हे अमृत । जेथींचें तेथें होय गुप्त । यालागीं होवोनि सुस्नात । स्वीकारा समस्त अमृतातें ॥९६॥ अमृतकुंभ गंगातीरी । मीं ठेविला दुर्वांकरीं । स्नान करोनियां समग्रीं ।

---

शब्दार्थ – १. शस्त्रसमूह, २. धैर्यानें मोठा, दांडगा, ३. पंखांचा, ४. अकुंठित, ५. अमृत, ६. सर्व, ७. महापराक्रमी, ८. आधार, ९. युक्ती, १०. सर्पांच्या मातेला, ११. अपवित्रपणाचे दोषाने, १२. उत्तम स्नान केलेली, १३. देवसमुदाय, १४. आनंदाने.

अमृताहारीं बैसावें ॥९७॥ अमृतकलश ठेवून । गरुडें आक्रमिलें गगन । विनता निर्मुक्त होवोन । आली आपण निजधामा[1] ॥९८॥ अमृत सेवावया प्रीतीं । सर्प आल्हादें स्नानें करिती । तंव कावळे अमृतार्थी । नेणों किती मिळाले ॥९९॥ इंद्रासी अमृताचा कळवळा । होवोनि आला डोमकावळा । अमृतकलश झडपोनि नेला । सर्पी केला हाहाकार ॥१००॥ अमृत नेतां झडकरीं । तें सांडलें दूर्वांकुरीं । तेणें दूर्वा अमर महीवरी । अद्यापिवरी टवटविती ॥१॥ अमृत नेतां पैं डोमकावळा । सर्प सोडिती विषाच्या गरळा । नकुळ सुरसाह्या पावला । सर्पां केला महामार ॥२॥ गरुडगति ते आकाशीं । नकुळगति ते विवरासीं । वेगीं येवोनि सर्पांपासीं । युद्धकंदनासी मांडिलें ॥३॥ सविख उभारोनि फडा । सर्प धांविती अमृतचाडा[2] । गरुडें नकुळ धाडिला गाढा[3] । सर्पांसीं झगडा तेणें केला ॥४॥ केलें दुखंड तिखंड पंचखंड । एक सर्प केले नवखंड । जे जे आतुर्बळी प्रचंड । ते ते शतखंड नकुळें केले ॥५॥ सर्पीं कवळोनि चौपासीं । मारूं जाती नकुळासी । गरुड पाठिराखा आकाशीं । तेणे तो सर्पांसी नाटोपे ॥६॥ घारी गीध गरुडाची सेना । सर्पां झडपोनि नेती गगना । एवं पन्नग[4] पावोनि कंदना । अमृतपानातें मुकले ॥७॥ नकुळ मार करी भूतळीं । गरुड गीध घारी अंतराळीं[5] । रणीं सर्पां केली रवंदळी[6] । भेणें पाताळीं रिघाले ॥८॥ गरुडें कैसी केली युक्ती । साधोनि मातेची निर्मुक्ती । आम्हां मारविलें नकुळाहातीं । अमृप्राप्ती कागासी ॥९॥ काग नव्हेति ते सुरवर । यालागीं गरुडें केला कैवार । नकुळें केला महामार । अति दुर्धर सर्पांसी ॥११०॥ दर्भीं सांडलें अमृत उदंड । सर्प चाटिती लावोनि तोंड । दर्भे जिव्हा जाल्या दुखंड । दुःख प्रचंड तेणें त्यांसी ॥११॥ अमृतस्वादाचिये भुली । दर्भ चाटितां जिव्हा चिरिली । शेखी काकुळती उरली । शीख[7] लाविली निजकपटें ॥१२॥ पितृभक्ति मातृभक्ती । तेणें गरुडासी अमृतप्राप्ती । कद्रुकपटाचिये गतीं । सर्प पावती अति दुःख ॥१३॥ सद्भावें भगवत्प्राप्ति । असद्भावें अधोगति । भगवद्भक्तां सुखप्राप्ति । दुःखप्राप्ति अभक्तां ॥१४॥ सर्पांपासोनि परमामृत । गरुडाचेनि देवां प्राप्त । इंद्रादि देव समस्त । गरुडें निश्चित सुखी केले ॥१५॥ देव पावोनि परमामृत । कुंडें भरलीं पाताळगत । राखण ठेवोनि इत्थंभूत । सुर समस्त सुखी केले ॥१६॥ त्रैलोक्यविजयी महावीर । धीर शूर अति उदार । हा गरुडाचा बडिवार[8] । सविस्तर सांगितला ॥१७॥ गरुडें सुखी कश्यप पिता । सुखी केली विनता माता । सुखी केलें सुरां समस्तां । विष्णुही तत्वतां सुखी केला ॥१८॥ ऐसी गरुडाची ख्याती । तो पितृव्य[10] मजला श्रीरघुपती । आणि आम्ही अरुणाची संतती । जटायु संपाती दोघे बंधु ॥१९॥

द्वौ पुत्रौ विनतायास्तु कथितौ गरुडारुणौ । तस्माज्जातोऽहमरुणात्संपाती च ममाग्रजः ॥२॥
जटायुरिति मां विद्धि श्येनीपुत्रमरिंदम । सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे ॥३॥

जटायूचे स्ववंशवर्णन व रामास आश्वासन : विनतेचे गरुड अरुण । त्याचें सांगितलें कथन । अरुणाचे आम्ही दोघे जण । जटायु आणि संपाती ॥१२०॥ अरुणा पित्याची आज्ञा चोख । सूर्यवंशीं व्हावें सेवक । तेथें जन्मले रघुकुळटिळक । विश्वतारक जगद्वंद्य ॥२१॥ याचिलागीं सूर्यवंशीं । सख्य केलें दशरथासीं । त्याचा तूं श्रीराम भेटलासी । आजि भाग्यासी सभाग्यता[11] ॥२२॥ ऐसें बोलोनियां जाण । जटायु घाली लोटांगण । श्रीरामें दिधलें आलिंगन । समाधान -

शब्दार्थ - १. आपल्या घरी, २. अमृताच्या इच्छेने, ३. शूर पराक्रमी, ४. सर्प, ५. आकाशामध्ये, ६.नाश, चुराडा, ७. शेवटी, ८. शिक्षा, ९. मोठेपणा, १०. काका, चुलता, ११. धन्यता.

तेणें त्यासी ॥२३॥ तुज पंचवटीं वसतां । सेवा सांगावी श्रीरघुनाथा । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । निजसेवकता मज द्यावी ॥२४॥ पंचवटीस सीता ठेवून । श्रीराम आणि लक्ष्मण । मृग मारूं गेलिया दोघे जण । सीतासंरक्षण मी कर्ता ॥२५॥ श्रीराम असतां नसतां । मी रक्षीन नित्य सीता । तेथें राक्षसभयाची कथा वार्ता । मज असतां जे कैंची ॥२६॥ माझिया पराक्रमापुढें । राक्षसबळ तें बापुडें । कोण पाहील आश्रमाकडे । चहूंकडे मी रक्षीन ॥२७॥ मी तराळ[1] आश्रमापासीं । घरटीं[2] करीन अहर्निशीं । सुखें राहावें आश्रमासी । मी विघ्नासी नेदीं रिघों ॥२८॥ करिता श्रीरामनामस्मरण । विघ्न तेंचि होय निर्विघ्न । तेथें मी काय रक्षीन दीन । सेवा करीन सद्भावें ॥२९॥ पंचवटीस जावें आवश्यक । मार्गद्रष्टा[3] मी सेवक । सीता सौमित्र रघुकुळटिळक । आल्हादें देख नेईन ॥१३०॥ ऐसी ऐकोनि जटायूची गोष्टी । श्रीराम चालिला जगजेठी । मग तिघें जणें उठाउठीं । पंचवटीं पावलीं ॥३१॥ गंगाजळतट-निकटीं[4] । देखोनियां पंचवटी । आल्हाद तिघांचिया पोटीं । गंगातटीं बसावया ॥३२॥ श्रीरामें वसविली पंचवटी । श्रीरामासन्मुख दृष्टी । जटायु राहे पर्वतपृष्ठी । करीत घरटी अहर्निशीं ॥३३॥ एकाजनार्दना शरण । श्रीराम सीता लक्ष्मण । केलें पंचवटिके आगमन । राक्षसदळण येथोनि ॥३४॥ राक्षस वधावया बोहणी । श्रीराम करील येथूनी । सुरस कथा रामायणी । श्रोतीं सज्जनीं परिसावी ॥१३५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां श्रीरामसीतालक्ष्मणजटायुपंचवट्यागमनं नाम सप्तमोध्यायः ॥७॥ ओंव्या ॥१३५॥ ॥ श्लोक ॥ ॥ ३ ॥ एवं ॥१३८॥

## अध्याय आठवा

### शूर्पणखेला विद्रूप करतात

॥श्रीरामचंद्राय नमः ॥

स तां पंचवटीं गत्वा नानाशकुनिनादिताम् । उवाच भ्रातरं रामो लक्ष्मणं शुभलक्ष्मणम् ॥१॥

अयं देशः समः श्रीमान्तुष्पितस्तरुभिर्वृतः । इहाश्रमपदं रम्यं यथावत्कर्तुमर्हसि ॥२॥

**पंचवटीत आगमन व वनसौदर्याने सर्वांना संतोष :** पंचवटीं गंगातटीं । श्रीराम सुखावे देखोनि दृष्टीं । सुखावली सीता गोरटी । आल्हाद पोटीं सौमित्रा ॥१॥ श्रीरामा देखोनि आल्हादें । कोकिळा कूजती पंचमशब्दें । घुमरी घुमघुमती स्वानंदें । सुखानुवाद अति मधुर ॥२॥ श्रीरामां तूं तूं सीते तूं तूं । धन्य धन्य सुमित्रा तूं तूं । ऐसें कपोत कूजतू । पुण्यपुरुषार्थी ये वनीं ॥३॥ स्वतःप्रमाण कीं परतःप्रमाण । प्रयोगोपाधीनें व्यावर्तित कोण । जहदजहल्लक्षणेचें काय प्रयोजन । शुक सारिका आपण विवादती ॥४॥ जेथें शुक बोले विचक्षण । आत्मा येथें स्वतःप्रमाण । तो जहदजहत्[5] नेणे । श्रीराम पूर्ण लक्षावा ॥५॥ ऐसें पक्षी विवादती । तेणें सुखावे श्रीराममूर्ती । लक्ष्मण चमत्कारें चित्तीं । सीता सती स्वानंदें ॥६॥ मयूर आनंदें नाचत । शुक पिंगळे अनुवादत । ये वनीं बसल्या श्रीरघुनाथ । पुण्यपुरुषार्थ पावेल ॥७॥ अति पावन पंचवटी । श्रीराम वसल्या जगजेठी । मारील राक्षसांच्या कोटी । सुखसंतुष्टी तिहीं लोकीं ॥८॥ ऐकोनि पक्ष्यांचें कूजित[6] । संतोषला श्रीरघुनाथ । सौमित्रासी स्वयें सांगत । आश्रम येथे निर्मावा ॥९॥

**अरुणावरुणासंगमावर आश्रमस्थापना :** अरुणावरुणासंगम सार । प्राची सरस्वती पवित्र ।

**शब्दार्थ** – १. बिगारी करणारा, सेवक, २. फेरी, प्रदक्षिणा, ३. मार्ग शोधक, वाट दाखविणारा, ४. गंगेच्या काठी, ५. एकाच वस्तूच्या ठिकाणी स्थलपरत्वें किंवा कालपरत्वें फरक झाला असतां तीच वस्तू पहिल्या वस्तूहून भिन्न भासूं लागतें, तेव्हां भेदभासक चिन्हें काढून टाकून वस्तूंचे ऐक्य करणे, ६. धुमणें.

लक्षून सुंदर कपालेश्वर । करीं सत्वर स्वाश्रम ॥१०॥ गंगातीर सम सुशीळ । वृक्ष पुष्पित सफळ । मलयानिळसुपरिमळ[१] । सुख प्रबळ ये वनीं ॥११॥ तूं तंव निजसखा लक्ष्मण । सर्वांगें सुंदर सुलक्षण । येथें वसतां सुख संपूर्ण । करीं निर्माण आश्रम ॥१२॥

एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः परवीरहा । अचिरेणाश्रमं भ्रातुश्चकार सुमहाबलः ॥३॥

पर्णशालां सुविपुलां चकार सुनरोत्तम : । उपास्यां राघवस्यार्थे प्रेक्षणीयामनुत्तमाम् ॥४॥

लक्ष्मणाचें शुभ लक्षण । नां म्हणों नेणे आपण । शिरीं वंदोनी श्रीरामचरण । करी निर्माण आश्रम ॥१३॥ यज्ञशाळा द्विजशाळा । जीवनशाळा शयनशाळा । निर्मिलिया पर्णशाळा । अति विशाळा ऋषिवासा ॥१४॥ वृंदावनें सुमनवनें । शोभताती वनें उपवनें । बिल्व अश्वत्थ मधुवनें । आम्रवनें मघमघित ॥१५॥ पंचपंच वृक्षांची दाटी । गंगातीरीं निकटनिकटीं । त्यांमाजी शोभे पंचवटी । देखतां दृष्टीं मन निवे ॥१६॥ अरुणा वरुणा सरस्वती । त्रिवेणी वाहे आश्रमाप्रती । सुंदर कपालेश्वरस्थिती । सन्मुख भासती आश्रमीं ॥१७॥

आश्रमातील दैनंदिनी : पंचवटीं आश्रम सुहावा[२] । हेचि श्रीरामाची निजसेवा । लक्ष्मणें केली सद्भावा । श्रीराघवसुखार्थीं ॥१८॥ उत्तमोत्तम आश्रमस्थिती । देखोनि सुखावे श्रीरघुपती । लक्ष्मणासी अति प्रीतीं । सुखानुभूतीं आलिंगी ॥१९॥ स्वयें श्रीरामसुखसमेळीं । नानापुष्पीं नानाफळीं । निजाश्रमीं दिधली बळी । जनकबाळीसमवेत ॥२०॥ श्रीरामसीताआश्रम-स्थिती । तेणें लक्ष्मणा सुखसंपत्ती । सेवा करावया अहोरातीं । उल्हास चित्तीं चौगुणा ॥२१॥ कुश[३] पुष्पें सुस्वाद फळें । शीतळ जळें सुपरिमळें[४] । लक्ष्मण पुरवी सर्वकाळें । सेवाबळें उल्हासी ॥२२॥ श्रीरामसेवेचें निजसुख । लक्ष्मणासी आत्यंतिक । विसरला द्वंद्वदुःख । परम हरिख सेवेचा ॥२३॥ श्रीरामसीतेचें चरणतीर्थ । सौमित्र नित्य सेवित । सेवेसी विकिलें जीवित सावचित्त सर्वार्थीं ॥२४॥

स्नानार्थ श्रीराम गेल्यावर सीतेचे कंबरेखालील वस्त्र व चोळी झोपेत अंगावरून दूर होते : सीतेपासीं संरक्षण । श्रीरामें ठेवून लक्ष्मण । आपण करूं गेला स्नान । अतिविंदान[५] तेथे जालें ॥२५॥ श्रीरघुनाथासी देखतां । कदा निद्रा न करी सीता । श्रीराम स्नाना गेला असतां । विश्रामता निजेली ॥२६॥ लक्ष्मणाचे दृष्टीसमोरीं । सीता स्वभावें निद्रा करी । वस्त्र उडालें गुह्यावरी । कुचांतरी निर्मुक्त ॥२७॥

तशाही प्रसंगी लक्ष्मण ध्यानमग्न : सुमित्रासी श्रीरामध्यान । न देखे कुच न देखे जघन । सीता दिसताहे नग्न । हेंही ज्ञान तो नेणे ॥२८॥ श्रीराम करोनि आला स्नान । सीता दिसताहे नग्न । लक्ष्मणासी स्वयें आपण । काय वचन बोलत ॥२९॥

अग्निकुंडसमा नारी घृतकुंभसमो नरः । दृष्ट्वा गुह्यं परस्त्रीणां कस्य नो चलितं मनः ॥५॥

स्त्री तंव अग्निकुंड केवळ । नर घृतकुंभ[६] तो विव्हळ । देखोनि नारीगुह्यस्थळ । मन निश्चळ कोणाचें ॥३०॥

लक्ष्मणोक्ति –

पिता यस्य शुचिर्भूतो माता चापि पपिव्रता । श्रीरामसेवानिरतस्तस्यैवं निश्चलं मनः ॥६॥

राम-लक्ष्मणांचा संवाद : पिता ज्याचा शुचिर्भूत । माता पतिव्रता निश्चित । श्रीरामसेवे नित्य रत । त्याचें चित्त चळेना ॥३१॥ श्रीरामभक्तांची निजस्थिती । गृह्यगुह्यार्थ देखती । तेणें चळेना चित्तवृत्ती । जाण निश्चितीं श्रीरामा ॥३२॥ देहींचिया विकारवृत्ती । स्त्रीपुरुषत्वा अभिव्यक्तीं । देह देहातीत[७] देखती । त्यांची वृत्ति चळेना ॥३३॥ सीता जगदंबा स्वयें सृष्टीं ।

शब्दार्थ – १. मलय पर्वतावरील सुगंधित वारा, २. सुशोभित, ३. दर्भ, ४. सुगंधित, ५. अद्भुत गोष्ट, ६. तुपाची घागर, ७. उघडपणा, स्पष्टता.

पाहोनि लक्ष्मणाची कसवटी[1] । ऐकोनि दोघांचिया गोष्टी । स्वयें उठी सलज्ज ॥३४॥

सीतेचा आदरभाव : लक्ष्मणाची स्थिती देखतां । सीतेने चरणीं ठेविला माथा । स्वयें श्रीराम जाला वंदिता । परमपूज्यता सौमित्रीं ॥३५॥ लक्ष्मणें घालोनि लोटांगण । दोहींचे मस्तकीं धरिले चरण । सेवासुख द्यावें मज आपण । पूर्ण पूज्यपण श्रीरामीं ॥३६॥ ऐकोनि सौमित्र-वचन । श्रीरामें देतां आलिंगन । दोघां नाठवे दोनीपण । जालें परिपूर्ण परब्रह्म ॥३७॥ पावोनियां पूर्ण बोध । लक्ष्मणा सेवेचा आल्हाद । सेवेलागीं जाला सावध । कथानुवाद अवधारा ॥३८॥ लक्ष्मण जावोनि वनासी । नित्य आणी वनफळांसी । तंव तेणें वनीं एके दिवशीं । आश्चर्यासी देखिलें ॥३९॥

सांबराक्षसाची काळखड्गप्राप्त्यर्थ तपश्चर्या : शूर्पणखेचा लाडका सुत । सांब राक्षस विख्यात । काळखर्गाचे[2] प्राप्त्यर्थ[3] । करी वनांत तपश्चर्या ॥४०॥ तपस्तेजें आतुर्बळी । ध्यानीं मंत्रमूर्ति आकळी । तंव त्यावरी वाढली वृक्षजाळी । जालें बहु काळीं वारुळ ॥४१॥ सांबतपश्चर्या अति अद्भुत । खर्गार्थी एकाग्रचित्त । काळखर्ग होतां प्राप्त । जालें विपरीत अदृष्टें ॥४२॥

त्या खड्गाच्या मनातून सांबाच्या हाती जावयाचे नसते म्हणून ते लक्ष्मणाच्या हाती जाते : खर्ग उतरतां सत्वर । तंव शस्त्रदेवता करी विचार । सांब महापापी दुर्धर । खर्गे अघोर करील ॥४३॥ निर्दाळील गोब्राह्मणां । वध करील दीनजनां । त्याच्या हाती मी स्पर्शेना । शरण लक्ष्मणा मी होईन ॥४४॥ हा तंव धर्माचा साहाकारी । अकिंचनां[4] कैवारी । दीनजनांतें उद्धरी । याच्या करीं मी पावेन ॥४५॥ सांब जे जाळींत तप करीत । लक्ष्मण फळें तोडी तेथ । खर्ग येवोनियां त्वरित । होय हस्तगत सौमित्रा ॥४६॥

त्यांची धार पाहण्यासाठी घाव मारतो तो नेमका झाडीतील सांबावर पडून त्याचा मृत्यू : वनफळें आसुंडितां[5] । अवचटें[6] काळखर्ग आले हाता । लक्ष्मण पाहे सभोंवता । तंव खर्गदाता न दिसेचि ॥४७॥ खर्गे सुखावला करतळीं । हरिखें वेळोवेळां तुळी । वाहों[7] पहावया तोडी जाळी । सांब ते वेळीं निवटिला ॥४८॥ घावो अतिशयें दुर्धर । जाळीसहित तुटलें शिर । भंडभडां[8] वाहे रुधिर । चिंतातुर सौमित्र ॥४९॥ कोण तपस्वी होता येथ । मज घडला ब्रह्मघात । स्वर्गी क्षोभेल दशरथ । सत्य श्रीरघुनाथ क्षोभेल ॥५०॥ कैचें खर्ग आलें हाता । तेणें हत्या बैसली माथरां । कैसेनि भेटों श्रीरघुनाथा । चित्तीं चिंता अनिवार ॥५१॥

ब्रह्महत्त्या-दोष घडला असावा अशा शंकेने लक्ष्मण व्याकुळ : ब्रह्महत्याऱ्याचें मुख । श्रीराम न पाहे सन्मुख । जीवीं लागली धुकधुक । परम दुःख सौमित्रा ॥५२॥ माता पिता बंधु गोत । माझा श्रीराम समर्थ । त्यासी सांगों वृत्तांत । प्रायश्चितार्थ पुसेन ॥५३॥ करितां श्रीरामनाम-स्मरण । कोटि दोषां होय दहन । त्यासी जालिया अनन्य शरण । हत्याहरण निमेषार्धे ॥५४॥ मुखीं श्रीरामनामवृत्ति । हृदयीं श्रीरामाची मूर्ति । पावलापावलीं श्रीरामस्थितीं । दोषनिवृत्ति[9] श्रीरामें ॥५५॥ श्रीरामस्थिती पाउल पडे । तेणें समाधिसुख गाढें । प्रायश्चित्त जालें बापुडें । श्रीरामाकडे पाहतांचि ॥५६॥ हत्याभयें श्रीरामस्थिती । दृढ धरोनियां चित्तीं । पुसावया प्रायश्चित्तार्थी । आला निश्चितीं सौमित्र ॥५७॥ श्रीराम सीता पुसे आपण । स्त्रियेंवाचून लक्ष्मण । दिसताहे अति उद्विग्न । दीनवदन आभासे ॥५८॥ श्रीराम म्हणे सीतेप्रती । सौमित्र नव्हे विषयार्थी । दिसे नूतन खर्गाची प्राप्ती । कांहीं वनाप्रती प्रवर्तलें[10] ॥५९॥ तंव लक्ष्मणें येवोनि आपण । साष्टांग घातलें लोटांगण । दोष घडला जी संपूर्ण । कृपा आपण

---

शब्दार्थ - १.देहापलीकडील, २. परीक्षा, ३. कालखड्ग मिळविण्यासाठी, ४. दरिद्री लोकांचा, ५. ओढिता, ६. अकस्मात्, ७. धार चालवून पाहण्याकरिता, ८. मारिला गेला, ९. दोषांचे निवारण, १०. घडले.

करावी ॥६०॥ जयजयाजी श्रीरघुनाथा । अनाथबंधो दीननाथा । कृपा करीं गा भगवंता । मज रक्षिता आन[1] नाहीं ॥६१॥ तळीं धरित्री पाहतां । वरी आकाश न्याहाळितां । दाही दिशा धांडोळितां । मज श्रीरघुनाथा आन नाहीं ॥६२॥ मी तंव नेणें माता पिता । बंधु भगिनी तूंचि तत्वतां । कौसल्येनें निरूपिलें वना येतां । मज रक्षिता तूंचि तूं ॥६३॥ लक्ष्मणाचें दीन वचन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । मग संकेत[2] पुसे आपण । येरु मस्तक खालवून । सांगता होय ॥६४॥ वनीं वनफळें तोडितां । अवचित खर्ग आलें हाता । त्याचा घावो पाहूं जातां । जाळी त्या अर्थी[3] तोडिली ॥६५॥ तंव जाळींत तप करीत । तपस्वी होता वारुळांत । त्याचा मज घडला घात । प्रायश्चित्तार्थ मज सांगा ॥६६॥

श्रीरामांनी मृतदेहाचा वर्ण विचारला : ऐकोनि सौमित्राचे वचन । मग बोलला श्रीरघुनंदन । वैश्य क्षत्रिय कीं शूद्र ब्राह्मण । वधिला कोण जाळीमाजी ॥६७॥ न करितां हा इत्यर्थ[4]। सांगतां न ये प्रायश्चित्तार्थ । लक्ष्मण धाडिला त्वरित । परीक्षार्थ प्रेताच्या ॥६८॥

शोध केल्यावर तो देह राक्षसाचा असल्याचे कळून आले : लक्ष्मण तें शरीर पाहे डोळां । भ्यासुर मुख दाढा विक्राळा । खापराऐसा सबाह्य काळा । नेत्र अनलासारिखे[5] ॥६९॥ लक्ष्मण सांगे इत्यर्थ । मज घडला राक्षसघात । ऐकोनि हांसे श्रीरघुनाथ । मुख्य धर्मार्थ हा आम्हां ॥७०॥

त्यामुळे ब्रह्महत्या झालीच नाही : तुज नाहीं निजज्ञान । शस्त्रदेवता अति सज्ञान । तिणें जाणोनि आपण । दुष्टनिर्दळण स्वयें केलें ॥७१॥ तो जरी सावध असता । तरी करिता तुझिये घाता । तुज प्रसन्न शस्त्रदेवता । न झुंजतां निर्दाळिला ॥७२॥ राक्षस अतुर्बळी होता । दुर्धर तपी शस्त्रप्राप्त्यर्था । दुष्टावरी क्षोभोनि शस्त्रदेवता । त्याच्याचि घाता तिणें केलें ॥७३॥ तपस्व्याच्या केलें घाता । दोष बैसला माझे माथां । ऐसें न म्हणावें तत्वतां । दोष सर्वथा न मानावा ॥७४॥

लक्ष्मणाला परमानंद : करावया राक्षसांचे घात । आम्ही आलों असों या वनांत । शस्त्रें धरोनि तुझा हात । केला प्राणांत दुष्टाचा ॥७५॥ तूं तंव नव्हेसी कर्मकर्ता । तुझ्या धरोनियां हाता । दुष्ट दमिला शस्त्रदेवता[6] । दोष सर्वथा तुज नाहीं ॥७६॥ दोष नाहीं तुझे माथां । पुसणें न लगे प्रायश्चिता । ऐसें श्रीराम बोलतां । उल्हासता सौमित्रा ॥७७॥ धन्य ज्ञान श्रीरघुनाथा । शोधोनि काढिलें इत्यर्था । मी तंव नव्हे कर्मकर्ता । दोष सर्वथा मज नाहीं ॥७८॥ धन्य धन्य श्रीरामकृपा । म्यां घेतलें दोषसंकल्पा[7] । तोचि केला निर्विकल्पा[8] । पुण्य पाप मज नाहीं ॥७९॥ ऐसें बोलोनि लक्ष्मण । मस्तकीं धरिले श्रीरामचरण। श्रीरामें दिधलें आलिंगन । समाधान सुबंधू ॥८०॥ श्रीरामाचे निजभक्त । कर्मे करोनि अलिप्त । हरिभक्तांचें पढतां चरित्र । नित्यमुक्त महादोषी ॥८१॥ करावया राक्षसांच्या घाता । काळखड्ग आलें हाता । श्रीरामें पूजिलें सद्भावता[9] । काळ सर्वथा साह्य आम्हां ॥८२॥ काळ साह्य जाला स्वभावतां। काळखर्ग आलें न प्रार्थितां । राक्षसनिर्दळणीं आतां । जाण तत्वतां सौमित्रा ॥८३॥

राक्षसवधाने दोष नाही : राक्षस वधावया रणीं। आजिपासून जाहली बोहणी। येथोनि विचरतां वनीं । सावधानीं वर्तावें ॥८४॥ याचा सूड घ्यावयासी । राक्षस येतील कपटवेषी । योगी संन्यासी तापसी । विश्वास त्यांसीं न करावा। ॥८५॥ अगत्य मानेल कर्तव्यता । ते मज पुसावी तत्वतां। मज पुसल्याविण सर्वथा। अल्पही कार्यार्थी न करावें ॥८६॥ शिरीं वंदून श्रीरामवचन। सौमित्र सदा सावधान। तंव तेथें करावया पुत्रशोधन । होईल आगमन शूर्पणखेचें ॥८७॥

---

शब्दार्थ – १. दुसरा, २. निमित्त, कारण, ३. त्या उद्देशाने, खड्गाची धार पाहाण्याकरिता, ४. निश्चय, ५. अग्नीसारखे, ६. शस्त्रदेवतेने, ७. दोषाची कल्पना, ८. शंकारहित, ९. उत्कट श्रद्धेने.

शूर्पणखेला पडलेले वाईट स्वप्न : शूर्पणखा स्वयें लंकेसी । देखती जाली दुष्ट स्वप्नांसी । पट्टाभिषेक होतां सांबासी । चरणघातेंसीं लोटिला ॥८८॥ मस्तकीं शेंदुराचा टिळा । गळां आरक्त कण्हेराच्या माळा । मुख माखिलें काजळा । भोंवता पाळा गोळांगुळांचा[१] ॥८९॥ सर्वांगीं तेलमज्जन[२] । नग्न गर्दभावरी आरोहण । दक्षिणदिशे करूनि गमन । गोमयऱ्हदीं[१] प्रवेशला ॥९०॥ शूर्पणखा सांगे रावणासी। दुष्ट स्वप्न देखिलें सांबासी । मी जाईन पद्मपुरासी । विमानेंसीं ते आली ॥९१॥

रावणाला निवेदन व तिचे पद्मपुरास आगमन, मुलाचे निधन कळल्यावरून तिचा शोक : भेटोनि त्रिशिराखरदूषणांसी । मग पाहूं आली ते सांबासी । देखोनि त्याच्या शिरच्छेदासी । आक्रंदेंसीं आरंबळे[३] ॥९२॥ काय विंदान[४] जालें यासी । कोण उठली गे विवसी[५] । काळ कृतांत भीती ज्यासी । तेणें भूमीसी स्वीकारिलें ॥९३॥ हा स्वभावें उघडी दृष्टी । तैं सुरासुर पळती दिक्पुटीं[६] । कळिकाळाची निवटे[७] दृष्टी । तो हा हठी पडला भूमीं ॥९४॥ तुज म्यां नवस केले बहुवस । अश्वत्थसेवा आणि उपवास । थोर धरिली तुझी आस । तो तूं उदास जालासी ॥९५॥ तुझिया देखोनि मुखकमळा । मज तंव पान्हा सुटला बाळा । तो सांब परलोकासी गेला । मजसीं अबोला धरूनियां ॥९६॥ ऐसें विलाप अनेक । मुखावरी ठेवी मुख । हा हा कोणें वधिला बाळक । थोर दुःख मज दिधलें ॥९७॥ रडोनि काय करूं येथ । कोणें केला पुत्रघात् । त्यासी पहावया निश्चित । वन समस्त ते शोधी ॥९८॥

लक्ष्मण दिसताच त्याच्या सूडाचा निर्धार : तंव खड्गसहित धनुष्यबाण । वनीं देखिला लक्ष्मण । सांबजीवघाती हाचि संपूर्ण । त्याचें भक्षण मी करीन ॥९९॥ सांब वधिला करितां ध्यान । तो जरी असता सावधान । तरी याचें करिता सगट प्राशन । बळ संपूर्ण सांबासी ॥१००॥ सांब माझा अतुर्बळी । येणें वधिला ध्यानसमेळीं[८] । यासी मी सगळेंचि गिळीं । करीन रांगोळी हाडांची ॥१॥ माझा सांब वधिला येणें । सांगों खरादिकां गाऱ्हाणें । तें तंज मज लाजिरवाणें । मारून नेणें त्यांपासीं ॥२॥ याचे अंगीं बळ संपूर्ण । सबळ बळाचें लक्षण । डोळां दोनी सहस्रनयन[९] । आणि नागचिन्ह बाहूंसी ॥३॥ डोळ्यांमाजी कूर्मदृष्टी । कळिकाळां न चळे पुष्टी । शेषशयनचिन्ह[१०] पृष्ठीं । अदृष्ट सृष्टीं आंगवण[११] ॥४॥

तिचे वेषांतर : यासी बहें गिळूं जातां । हा करील माझ्या घाता । दळून मारावा सर्वथा । याची कांता होवोनी ॥५॥ स्वरूपरूपें अति सुंदर । अलंकार ल्याली मनोहर । वांकी अंदुवांचा गजर । उभी समोर सौमित्रा ॥६॥ शीसफूल राखडी फरा गोंडा । पोफळ चांपेकळी केतकी दांडा । दोहीं हातीं जडित चुडा । मुखीं विडा सुरंग ॥७॥ अंगीं मदुवीची कांचोळी । गळां हार एकावळी[१२] । पाठीवर वेणी मोकळीं । गोंडा दुफुलीसहित ॥८॥ नेसली क्षीरोदकपाटोळा[१३] । मध्यभागीं जडित कटिमेखळा । हळदी उटिली मुखकमळा । काजळ डोळां भळभळीत ॥९॥

शूर्पणखेची लक्ष्मणाला लग्नाची विनंती : डोळे मोडी लक्ष्मणाकडे । दुडीपीडी[१४] करूनियां पायां पडे । लाजोनि पाठिमोरी मुरडे । पाहे देहुडे[१५] लक्ष्मणासी ॥११०॥ मी तरी कुबेराची भगिनी । तुमचे प्राप्तीलोगोनी । बैसलें होतें अनुष्ठानीं । धर्म पत्नी मी होईन ॥११॥ सुंदर

---

शब्दार्थ – १. वानरांचा, २. तेल चोपडणे, ३. आक्रोशू लागली, ४. प्रकार, ५. राक्षसी, ६. दाही दिशांस, ७. नाश पावे, ८. ध्यानयुक्त असता, ९. इंद्र. १०. विष्णूचे चिन्ह, ११. पराक्रम, १२. एकपदरी, १३. चित्रविचित्र रेशमी वस्त्र, १४. हावभाव, १५. एका पायावर उभा राहिलेल्या.

आवडे डोळ्यांसी । परी रामाज्ञा आठवे लक्ष्मणासी । राक्षस येती कपटवेषीं । विश्वास त्यांसीं न धरावा ॥१२॥ ती घेवोनि कमळमाळा । घालूं आली लक्ष्मणाच्या गळां । येरू मनोनि विटाळा । परता सरला सक्रोध ॥१३॥ मजसारिखी सुंदर कांता । वनीं मिनलिया[१] एकांता । नपुंसकही न सरे मागुता । तुझी पुरुषता सभय कां ॥१४॥ ती तंव तुझी केवळ चरणदासी । सेवा करीन अहर्निशीं । शयन करूं पर्णशेजेसीं । शंका मानसीं न धरावी ॥१५॥ माझा भोगिल्या गुह्यार्थ । कळेल सर्वही भावार्थ । माझेनि संगें पुरुषार्थ । जगीं विख्यात पावाल ॥१६॥

लक्ष्मणाने सांगितल्यावरून ती रामांकडे जाते : सौमित्र म्हणे ऐक आतां । श्रीराम माझा ज्येष्ठ भ्राता । त्याची आज्ञा मज न होतां । तुज सर्वथा नांगीकारीं ॥१७॥ श्रीराम ज्येष्ठ बंधु तो कैसा । कोण पुरुषार्थ कैसी दशा । समूळ आणावया मानसा । मार्गजिज्ञासा[२] पूसत ॥१८॥ येणेंचि मार्गें गंगातटीं । श्रीरामाश्रम पंचवटीं । श्रीरामे वसे जगजेठी । सीता गोरटीसमवेत ॥१९॥ माझ्या पुत्राचे हे वैरी । रम्याश्रम गंगातीरीं । नांदतीती बरव्या परी । सीता सुंदरी प्रियतमा ॥१२०॥ श्रीराम आणि लक्ष्मण । दोघे छळून मी मारीन । सीता सुंदरी नेऊन । स्वयें अर्पीन लंकानाथा ॥२१॥

लक्ष्मणाला आपल्याबरोबर लग्न करण्यास आज्ञा देण्याची ती विनंती करते : मग पंचवटीस जाऊन । श्रीरामा घालोनि लोटांगण । भाउजी वंदितें श्रीचरण । बाईसी शरण सर्वभावें ॥२२॥ मी तंव तुमची धाकटी जाऊ । मजवरी कृपा करावी बहू । भावे साचे धाकटे भाऊ । लग्नगौरवू न मानिती ॥२३॥ भावे साचे आज्ञेवीण । माझें न करिती पाणिग्रहण । भाऊजींसी तुम्हीं सांगून । लावावें लग्न सौमित्रासीं ॥२४॥ सीता म्हणे श्रीरामासी । सौमित्र कष्टताहे अहर्निशी । सुंदर कांता जोडिली त्यासीं । मज वनवासीं सांगतिणी ॥२५॥

श्रीरामांना तिच्या डोळ्यांवरून तिची ओळख पटते : श्रीराम पाहे जंव सुंदरी । उलट बाहुल्या देखे नेत्रीं । हे तंव केवळ निशाचरी । छळणावारीं आलीसे ॥२६॥ तिचा जाणोनि भावार्थ । हांसोनि बोले श्रीरघुनाथ । माझा सौमित्रीं संकेत । असे विपरीत एक सुंदरी ॥२७॥ पाठीसीं लिहिल्या अक्षरासीं । आज्ञा माने सौमित्रासी । पत्र न माने वो तयासी । मुखवचनासी मानीना ॥२८॥

रामांकडून तिची बोळवपण : आज्ञा मागतां एकाएक । मुहूर्तीं श्रीरामीं विमुख । पतीसी पत्र दावितां देख । तेथेंही विमुख म्यां व्हावें ॥२९॥ विमुखपणाचा सोहळा । मुळींच आला माझ्या कपाळा । लग्नपत्रिका न दिसे डोळां । श्रीराम भोळा म्हणों नये ॥३०॥ दोघां छळावें हें माझें मत । परी श्रीराम छळणासी नव्हे प्राप्त । आपलें कळों नेदी वृत्त । पत्र गुप्त पृष्ठभागीं ॥३१॥ पृष्ठभागीं आज्ञा लग्न । वनीं लक्ष्मण निर्दळीन । मग निर्दळावया श्रीरघुनंदन । खर दूषण आणीन ॥३२॥ पद्मपुरा निकटानिकटीं । श्रीराम मारिजेल राक्षससुभटीं[३] । सीता हिरोनि गोरटी । नेईन भेटी लंकानाथा ॥३३॥ श्रीराम दुबाहु माणूस । खर दूषण उग्र राक्षस । श्रीरामा मारितां न लगे निमेष । सीता लंकेश भोगील ॥३४॥ पुत्रवैरी वधावा पुढें । विचार केला निजनिवाडें[४] । सलज्ज बोले सीतेपुढें । मज सांकडें ओढवलें ॥३५॥ नेम केलासे भावेंसी । लग्नपत्रिका ते पाठीसीं । पाठिमोरी मी बैसूं कैसी । भाउजींसी तुम्ही सांगा ॥३६॥ पाठिमोरी बैसतां जाण । लाजें जाईल माझा प्राण । बाइजी सांगोनि आपण । पत्र लिहोन करीं द्यावें ॥३७॥ स्त्रियांचे जिणें लज्जायुक्त । बाइजी जाणां तुम्ही समस्त । प्रार्थोनियां श्रीरघुनाथ ।

---

शब्दार्थ – १. मिळाली असता, २. मार्ग जाणण्याच्या इच्छेने, ३. राक्षसांतील महावीरांनी, ४. स्वतःच्या निर्धाराने.

पत्रलिखित करीं द्यावें ॥३८॥ श्रीरामाचा निजभावार्थ । पत्र दिधलिया वाचील अर्थ । मग करूं धांवेल अनर्थ । केला विपरीतार्थ यालागीं ॥३९॥ सौमित्रातें वरूं पाहसी । तरी पत्र लिहूं दे पाठीसी । नाही तरी जावोनि वनासी । येईल मनासी तो वरीं ॥१४०॥ ऐसें ऐकोनि श्रीरामवचन । उकसाबुकसीं करी रुदन । जळो तें आणिकाचें वदन । श्रीलक्ष्मण निजपति ॥४१॥ भाउजी शिवतें तुमचे चरण । मी तंव पतिव्रता संपूर्ण । प्राणपति श्रीलक्ष्मण । तुम्हीं कठिण न वदावें ॥४२॥ मग श्रीराम बोले धर्मवचन । ज्येष्ठ भावजयी मातेसमान । कनिष्ठ तें लेंकरूं जाण । लाजेसी कारण असेना ॥४३॥ मग श्रीरामापुढें पाठिमोरी । येवोनि बैसली झडकरी । पत्र लिहावें पाठीवरी । आज्ञाधारी मी तुमची ॥४४॥

तिच्या पाठीवर लक्ष्मणास सूचना : शूर्पणखेची न पडे दृष्टी । पत्र लिहिलें कटिपृष्ठीं । पत्रीं लिही विकट गोष्टी । सावधानदृष्टीं अवधारा ॥४५॥ सहनासिक सगटओष्ठ । वेगें करावें सरसपाट । हाचि इचा शेंसपाट । आज्ञा वरिष्ठ हे माझी ॥४६॥ करूं नये स्त्रीहनन[१] । यालागीं इचा राखावा प्राण । करावें नासिकाच्छेदन । हेंचि सुलग्न पैं इयेचें ॥४७॥ काय लिहिलें पाठीसीं । हें तों न कळे शूर्पणखेसी । वंदोनि श्रीरामसीतेसीं । लक्ष्मणापासीं ते आली ॥४८॥ वेगीं घेवोनियां माळेसी । वरूं आली लक्ष्मणासीं । तो कोपला अतिशयेंसीं । निर्लज्ज होसी तूं एक ॥४९॥ श्रीरामाचे आज्ञेवीण । मी न करीं पाणिग्रहण । जळो तुझें काळें वदन । आज्ञेविण वरूं येसी ॥१५०॥ भाउजी बाइजी कृपाळु पूर्ण । तिहीं दिधलें आज्ञापन । परी तुम्हांपासीं कठिणपण । सांगेन खूण ते ऐका ॥५१॥ भाउजी श्यामसुंदर जगजेठी । बाइजी चांपेकळी गोरटी । मज भेटलीं पंचवटीं । आज्ञा वाक्पुटीं वरावें तुम्हां ॥५२॥ तोंडीचे तोंडी आज्ञापन । सौमित्र म्हणे मानी कोण । तोंडीचें तोंडीं होईल वरण[२] । सत्य जाण सुंदरी ॥५३॥ माझा विश्वास नाहीं तुम्हांसी । जन्म कंठणें पायांपासीं । लटिकें बोलिल्या चरणांसी । मुख श्रीरामासी केंवी दावूं ॥५४॥ थोर श्रमलेति वनांतीं । चरण तळहातीन[३] हातीं । दोघें शयन करूं एकांतीं । तेणें विश्रांति पावाल ॥५५॥ लक्ष्मण म्हणे तूं तंव लंड । बोलाची बडबड उदंड । घाय हाणोनि फोडीन तोंड । तूं वेश्या रांड व्यभिचारिणी ॥५६॥ श्रीरामाचें हस्तलिखित । देखल्यावीण न लावीं हात । जवळी आलिया करीन घात । म्हणोनि खर्गा हात घातला ॥५७॥ म्हणे मी कपाळकरंटी । सत्य न माने माझी गोष्टी । श्रीरामलिखित पहा दृष्टीं । म्हणोनि पृष्ठी दाविली ॥५८॥

श्रीरामांच्या सूचनेप्रमाणे तिची संभावना : श्रीरामाचीं हस्ताक्षरें । सार्थक वाचिली सौमित्रें । वेणी दंड धरोनि करें । बलात्कारें पाडिली ॥५९॥ मी काय धाकुटी कर्णकुमारी । मज झोंबोनि पाडितां पृथ्वीवरी । मीच पडतें धरणीवरी । पुरुषार्थ करीं प्राणनाथा ॥१६०॥ पाय देवोनि उरावरी । सओष्ठनासिका[४] शस्त्रधारीं । सरसकटून[५] क्षणामाझारीं । राहिला दुरी शस्त्रेंसीं ॥६१॥ घायें उडविलें कपटपण । क्रूर राक्षसी अति दारुण । बारा हस्त एकैक स्तन । नाकेंवीण विक्राळ ॥६२॥

तिचा आक्रोश व पलायन : शंख करी सुबद्ध । फेंफें करीत निघे शःब्द । नाकेंवीण अति विरुद्ध । धरिला क्रोध सौमित्रीं ॥६३॥ जैसें म्यां केलें कपट । तैसेचि जालें सपाट । याचा मी भरीन घोंट । मुख अचाट पसरिलें ॥६४॥ मुख पसरी गिळावयासी । तंव लक्ष्मण शस्त्रातें हातवसीं[६] । घाव घालावा जो शिसीं[७] । तंव राक्षसी पळाली ॥६५॥

---

शब्दार्थ - १. स्त्रीहत्या, २. स्वीकार, ३. रगडीन, चेपीन, ४. ओठांसकट नाक, ५. कापून काढून, ६. हातात घेतले. ७. मस्तकावर.

**लक्ष्मणाने घडलेले श्रीरामांना निवेदन केले :** सौमित्र आला पंचवटीं । श्रीरामासी सांगितली गोष्टी । समूळ राक्षसी ते खोटी । टाळी पिटिती परस्पर ॥६६॥ धन्य श्रीराम सूर्यवंशी । कपटी ओळखिली राक्षसी । पत्र लिहिलें पाठीसीं । तेणें म्यां तिसी दंडिलें ॥६७॥ पत्र पडतें तिच्या हातीं । तैं ते भोवती[1] आम्हांभोंवती । भली श्रीरामें केली युक्ती । पृष्ठपत्रार्थी दंडविली ॥६८॥ तुझी आज्ञा आत्यंतिक । आज्ञेनें तिसी लाविली सीक[2] । सओष्ठ छेदोनि नासिक । विरूप देख ते केली ॥६९॥ सुपायेएवढी नखें देखा । यालागीं म्हणती शूर्पणखा । सौमित्रें छेदोनि नासिका । टाकिलें उदकामाझारीं ॥१७०॥ शूर्पणखेचें छेदिलें नाक । ते तीर्थी मासे निर्नासिक । अद्यापि देखती लोक । ऐसी सुटंक[3] दंडिली ॥७१॥ तिचा न घ्यावा निजप्राण । ऐसी तुझी आज्ञा पूर्ण । यालागीं ते राखिली जाण । गेली पळोन पद्मपुरा ॥७२॥ तंव सीतेसी म्हणे रघुनंदन । सुमित्रपत्नीचें लग्न । नासिका लावोनि सुलग्न । आला सावधान सौमित्र ॥७३॥

**या घटनेपासून राक्षसांशी भांडणाला प्रारंभ :** रणबोहलें सोहळियाकारणें । होईल बाणाचें उटणें । अशुद्धें[4] आंबा शिंपणें । तळीं बसविणें शस्त्राचें ॥७४॥ येथे नाचेल रणधेंडा[5]। ओवाळणी पडत्ती राक्षसमुंडा । आयणी पायणी दोहीं कडां । शस्त्रें भडभडां पडतील ॥६५॥ श्रीराम बोलिला आपण । झालें कलहासी कारण । त्रिशिरा आणि खर दूषण । निर्दळीन रणकंदनें ॥७६॥ ऐसें बोलतांचि जाण । बाहूंसी आलें स्फुरण । करावया अरिमर्दन । धनुष्यबाण उचलिले ॥७७॥ एकाजनार्दना शरण । शरण आलें श्रीरामा स्फुरण । निर्दळील खरदूषण । श्रोतीं अवधान मज द्यावें ॥७८॥ इति भावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां शूर्पणखाविरूपकरणं नामाष्टमोऽध्याय: ॥८॥ ओंव्या ॥१७८॥ श्लोक ॥६॥ एवं ॥१८४॥

# अध्याय नववा

## खर-दूषणांशी युद्ध

**विद्रूप शूर्पणखा पद्मपुरीला जाते :** श्रीसीतापतये नमः । घेवोनि लक्ष्मणाचा दरारा । शूर्पणखा आली पद्मपुरा । निर्नासिकी विरूपाकारा । रुधिरधारा लागलिया ॥१॥ राक्षससभेचिये मेळीं । शूर्पणखा अतुर्बळी । ते सरकटली समूळीं । राक्षसकुळीं गांजिली ॥२॥ शूर्पणखा अति दुर्धर । तीतें विटंबिलें तो महावीर । राक्षसां धाक लागला थोर । निशाचर चळीं कांपती ॥३॥ शूर्पणखेचें विरूपकरण[६] । देखोनियां खर दूषण । कोपा चढले अति दारुण । क्रोधें गर्जोन पूसत ॥४॥

**तां तथा पतितां दृष्ट्वा विरूपां शोणितोक्षिताम् । भगिनीं क्रोधसंतप्तः खरः पप्रच्छ राक्षसः ॥१॥**
**बलविक्रमसंपन्ना कामगा कामरूपिणी । इमामवस्थां नीता त्वं केनांतकसमागता ॥२॥**

**खर-दूषण राक्षसास निवेदन व त्यांचा संताप :** शूर्पणखा शंख करून । दुःखे पडली मूर्च्छापन्न । तिचें देखोनि विरूपकरण । खर आपण विस्मित ॥५॥ सओष्ठ नासिका छेदोनि मुळीं । उघडी पाडिली दांताळी । ऐसा कोण बळियां बळीं । रक्तें न्हाणिली शूर्पणखा ॥६॥ बळियां बळी शूर्पणखा । इचा चळकांप इंद्रादिकां । इचा धाक अंतका । हे तिहीं लोकां दुर्धर ॥७॥ ऐसी हे अति बळिष्ठ । कामरूपी कपटें वरिष्ठ । इचें केलें सरसपाट । ऐसा वीर उद्भट कोण आहे ॥८॥

---

**शब्दार्थ -** १. त्रासदायक झाली असती, २. शिक्षा, ३. उत्तम प्रकारे, ४. रक्ताने, ५. वधूवरांना उचलून घेऊन नाचणे, ६. विद्रूप.

इति भ्रातुर्वचः श्रुत्वा क्रुद्धस्य च विशेषतः । ततः शूर्पणखा वाक्यं सबाष्पामिदमब्रवीत् ॥३॥
तरुणौ रुपसंपन्नौ सुकुमारों महाबलौ । पुंडरीकविशालाक्षौ चीरकृष्णाजिनांबरौ ॥४॥
इमावस्थां नीताहं यथाऽनाथा सती तथा । तस्यास्तयोश्च रुधिरं पिबेयमहमाहवे ॥५॥

शूर्पणखेकडून रामस्वरूपवर्णन व वृत्तांतकथन : भगिनीचेनि कैवाडें[1] । खर बंधु पुसे वाडेंकोडें[2]। तंव ते सक्रोध रडे । तापसीं गाढें गांजिले ॥९॥ तरी ते तापसी नव्हती ब्राह्मण । क्षत्रिय नव्हेति साधारण । वैश्य शूद्र नव्हेति जाण । योद्धे दारुण महावीर ॥१०॥ दोघे दारुण राजकुमर । गौर श्याम अति सुंदर । चीरकृष्णाजिनांबर । राजीवनेत्र[3] राजस ॥११॥ ज्येष्ठा नांव रघुनंदन । कनिष्ठा नांव लक्ष्मण । अति सुंदर ते दोघे जण । त्यांऐसा आन असेना ॥१२॥ इंद्रादि देव मदनमूर्त । श्रीरामापुढें ते खद्योत[4] । दानव मानव मशक तेथ । शोभा अद्‌भुत श्रीरामीं ॥१३॥ ज्येष्ठा श्रीरामाची नारी । लावण्यराशी सीता सुंदरी । रमा[5] न पवे तिची सरी[6] । तीऐसी दुसी असेना ॥१४॥ होतां सीतेचें दर्शन । निवालें माझे दोनी नयन । देखतांचि श्रीरघुनंदन । काया वाचा मन निवालें ॥१५॥ देखतां श्रीरामलक्ष्मण । मी पावलें समाधान पुत्रद्वेषें त्यांसी आपण । कपटे छळण करूं गेलें ॥१६॥

तिच्या कपटामुळे ती विद्रूप होते : त्यांसी न चले कपटाचा छळ । त्यांसी न चले क्रोध सबळ । सिद्धि न पवेचि माझें सळ[7] । तिहीं तत्काळ विटंबिलें ॥१७॥ पाय देवोनि उरासीं । लक्ष्मणें छेदिलें नासिकेसी । जया सांगे म्हणे बळियापासीं । ते मीं तुम्हांपासीं सांगूं आलें ॥१७॥

तिचा आक्रोश व सूडबुद्धी : यापरी गांजिलें तापसीं । करा माझ्या कुडाव्यांसी[8] । म्हणोनि लागली पायांसी । उकसाबुकसीं स्फुंदत ॥१९॥ त्यांसी तूं पाडिसी रणीं । त्यांचे नळीं मी बैसोनी । घटघटां रुधिरप्राशनीं[9] । नवस मनीं दृढ केला ॥२०॥ ऐकोनि भगिनीचें वचन । कोपा चढले खर दूषण । निधडे राक्षस चौदा जण । अति दारुण धाडिले ॥२१॥ तुम्हीं पंचवटीं जाउनी । श्रीराम लक्ष्मण मारोनी । सीता आणावी धरोनी । रुधिर प्राशनीं शूर्पणखे ।२२॥

चौदा दूतास रवाना केले : शूर्पणखेचें मनोगत । त्या दोघांचें प्राशावें रक्त । तें ईस द्यावया आतृप्त । दूत त्वरित पाठविले ॥२३॥ राक्षस सत्राणें गर्जत । दोघांवरी चवदा दूत । बापुडें कायसें रघुनाथ । निमेषार्धात माराया ॥२४॥ रुधिर प्राशावया देखा । सवें दिधली शूर्पणखा । तिणें दाखविली पंचवटिका । रघुकुळटिळकासमवेत ॥२५॥ कातिया त्रिशूळ तोमर । झेलिती शस्त्रांचें संभार । चवदा राक्षस अति दुर्धर । श्रीरामासमोर लोटलें ॥२६॥ एक म्हणे श्रीरामासी । मी मारीन मुद्गलेंसीं । एक म्हणे मी लक्ष्मणासी । पट्टिशेंसीं[10] मारीन ॥२७॥ एक म्हणे मी दोघांसी । शस्त्रेंसहित गिळीन त्यांसी । एक म्हणे तूंचि खासी । वांटा आम्हांसी पाहिजे ॥२८॥ एक म्हणे हे मारोनि वीर । शूर्पणखा प्राशील रुधिर । मांस विभागून समग्र । अति अरुवार[11] आरोगूं ॥२९॥ एक म्हणे या दोघांसी । धरोनि नेईन खरापासीं । तो रक्त देईल भगिनीसी । मांस त्यासी भोजना ॥३०॥ ते दोघे आम्ही बहुत । विचार कायसा येथ। म्हणोनि राक्षस पिलंगत[12] । आश्रमांत निघाले ॥३१॥

त्या चौदा जणांना श्रीरामांचा प्रश्न : श्रीराम सीता लक्ष्मण । आश्रमीं नित्य सावधान । तंव चवदा राक्षस देखोन । श्रीरघुनंदन हांसिला ॥३२॥ श्रीराम म्हणे रे लक्ष्मणा । राक्षस आले

---

शब्दार्थ – १. कैवाराने, मोठ्या कौतुकाने, ३. कमलनेत्र, ४. काजवे, ५. लक्ष्मी, ६. तुलना, बरोबरी, ७. वैर, ८. राक्षणास, ९. रक्त पिण्याकरिता, १०. मौजेने, ११. जेवूं, १२. पुढे पुढे धावत.

चवदा जण । एकेंचि बाणे घेइन प्राण । धनुष्यबाण दे वेगीं ॥३३॥ माझ्या बाणाचा महामारू । तुम्ही दोघें पहा सादरू । म्हणोनि उठिला श्रीरघुवीरू । धनुष्यीं शरू सज्जिला ॥३४॥ श्रीराम म्हणे राक्षसांसी । आम्ही गंगातीरीं तापसी । तुम्ही कां आलेति मरायासी । कोणें तुम्हांसी धाडिलें ॥३५॥

दूतांचे प्रत्युत्तर व श्रीरामबाणांनी त्यांचा नाश : अरे तुम्ही दोघे जणीं । विटंबिली खराची भगिनी । तापसी म्हणोनि करिता ग्लानी । तुम्हांसी कोणी सोडीना ॥३६॥ तापसी आणि धनुष्यबाण । स्त्रियेचें करावें विटंबन । धन्य धन्य तुमचें तापसपण । आपणा आपण लाजाना ॥३७॥ ऐसें बोलोनि समस्तीं । शस्त्रें सांडिलीं नेणों किती । बाप धनुर्वाडा श्रीरघुपती । हातींचे हातीं छेदिलीं ॥३८॥ श्रीरामबाणाच्या कडाडीं । राक्षसां वळली मुरकुंडी । डोळ्यां पडली झांपडी । केलीं बापुडीं क्षणामाजी ॥३९॥ हाटकपत्रीं[१] घेवोनि बाण । चतुर्दशविधींचे विधान । अभिमंत्रोनि सोडितां बाण । घेतला प्राण चवदांचा ॥४०॥ आर्तुबळें सोडिला शर । भेदोनि चवदांचें शरीर । धरणीं पाडिले महावीर । श्रीरामचंद्र निजविजयी ॥४१॥ भेदोनि चवदांचें शरीर । गगनीं परिभ्रमें शर । केउता त्रिशिरा दूषण खर । तेही सत्वर वधावया ॥४२॥ खर दूषण नाढळतां । बाण रिघाला श्रीरामभातां । हस्तलाघव श्रीरघुनाथा । देखोनि सीता विस्मित ॥४३॥ विस्मय करिती सुरवर । विस्मय करिती खेचर । श्रीराम स्वयें रणरंगधीर । एकांगवीर श्रीराम ॥४४॥ तंव चवदा जणांचे पाठीसीं । देखिलें नकटे शूर्पणखेसी । लक्ष्मण धांवला मारावयासी । तंव ते अति आक्रोशीं पळाली ॥४५॥

लक्ष्मण क्रोधाने शूर्पणखेचा वध करण्यास प्रवृत्त : हा कां पडला माझे हटीं । मारूं धांवे देखतां दृष्टीं । धाकें पळतां उठाउठीं । धाक पोटीं न माये ॥४६॥ नकटें मुख घेवोनि येथ । प्राशूं आमचे आली रक्त । बाणें करतां तिचा घात । धरिला हात श्रीरामें ॥४७॥

स्त्रीवध निषिद्ध म्हणून श्रीरामांनी प्रतिबंध केला : करूं नये स्त्रियेचा घात । हा तंव मुख्यत्वें शास्त्रार्थ । आणीक एक आहे वृत्तांत । सावचित्त अवधारीं ॥४८॥ जैसा सांडस भात्याजवळीं । तापला घाली घायातळीं । तैसी शूर्पणखा कंकाळी[२] । राक्षसकुळीं घातकी ॥४९॥ इचेनि योगें जाण । वधिजेति रावण कुंभकर्ण । ईस न मारावें आपण । राक्षसदळण इचेनि ॥५०॥ जेंवी दळणारी जांत्यापासीं । वैरण घाली घांसोघांसी । तेंवी शूर्पणखा आम्हांपासीं । राक्षसांसी वैरील ॥५१॥ पहिलें वैरण खर दूषण । दुसरें लंकेशप्रधान[३] । तिसरें वैरण कुंभकर्ण । चवथें जाण इंदजित[४] ॥५२॥ पांचवें वैरण जाण । सपुत्र सैन्येंसीं रावण । यासी शूर्पणखा कारण । सत्य जाण सौमित्रा ॥५३॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । सौमित्रें ठेविलें धनुष्यबाण । मस्तकीं वंदिले श्रीरामचरण । ज्ञान विज्ञान[५] श्रीराम ॥५४॥ चवदा विद्यांसीं अविद्याच्छेद[६] । करोनि चवदाही परमानंद । श्रीरामाचा बाणबोध । परमात्मबोध प्रबोधी ॥५५॥

श्रीरामबाणाने चौदा राक्षसांना उत्तम गती प्राप्त : श्रीरामाचा निजबाण । देह छेदी हें नवल कोण । छेदोनियां जरा जन्म मरण । चवदाही जण सुखी केले ॥५६॥ संकल्पविकल्पेसीं मन । छेदिलें चित्ता चिंतन । छेदोनियां मानाभिमान । चवदाही जण सुखी केले ॥५७॥ छेदोनियां विषयज्ञान । छेदोनियां भवभान । छेदोनियां देहबंधन । चवदा जण सुखी केलें ॥५८॥ छेदोनियां कर्माकर्मबंधन । छेदोनियां कार्य कारण । छेदोनियां मीतूंपण । चवदाही

---

शब्दार्थ – १. सोनपंखी, २. राक्षसी, ३. रावणाचे प्रधान, ४. रावणाचा पुत्र, ५. अनुभवज्ञान, ६. अज्ञानाचा नाश.

जण सुखी केलें ॥५९॥ शूर्पणखेचें अभाग्य पूर्ण । नव्हेचि श्रीरामबाणें मरण । पळाली देहलोभा भेण । शंखस्फुरण[1] करीतचि ॥६०॥ श्रीराम मोक्षाचें भरित । वैरी मारोनि करी मुक्त । नामें जडजीव उद्धरत । स्मरणें निर्मुक्त श्वपचादि[2] ॥६१॥ एकाजनार्दना शरण । यापरी मारिले चवदा जण । शूपर्णखा पळाली आपण । खर दूषण वधावया ॥६२॥

खरोक्ति –

स पुन: पतितां दृष्ट्वा क्रोधाच्छूर्पणखां खर: । उवाच व्यक्तया वाचा भगिनीं पुनरागताम् ॥६॥
मया त्विदानीं शूरास्ते राक्षसा रुधिराशिन: । त्वात्प्रियार्थ विनिर्दिष्टा: किमर्थं रुद्यते पुन: ॥७॥

शूर्पणखेने वृत्तांत सांगितला, रामप्रतापाचा परिणाम : शंखस्फुरणें मारितां हाका । पळोनि आली शूर्पणखा । आड पडली खरादिकां । अधिकाधिक गांजिलें ॥६३॥ खरासी आला अति आवेश । चवदा अर्तुबळी राक्षस । रणरगडे[3] रणकर्कश । तुज साह्यास म्यां दिधले ॥५४॥ कोपलिया चवदा जणीं । सुरनर कांपती चवदा भुवनीं । ते न येती माझ्या वचनीं । त्यांलोगोनि तूं रडसी ॥६५॥ सांगतां चवदांचें गाऱ्हाणें । पुढती रडणें आड पडणें । तूं का रडसी मज कारणें । येरी सांगे वृत्तांत ॥६६॥ तुझे चवदांही राक्षस । अर्तुबळी अति कर्कश । कातिया त्रिशूळ झेलिती फरश । घेवोनि पट्टिश[4] चालिले ॥६७॥ एक म्हणती गिळूं रामासी । एक म्हणती मारूं लक्ष्मणासी । एक मांसासी एक रुधिरासी । एक दोघांची गिळूं पाहाती ॥६८॥ म्हणती शूर्पणखेसी । पांजूं दोघांच्या रुधिरासी । मग भक्षावें मांसासी । ऐसा राक्षसी विवादू ॥६९॥ राहें साहें धीर वीर । घाय साहें परम शूर । ऐसा करिती गिरागजर[5] । निशाचर लोटले ॥७०॥ राक्षसां देखोनियां दिठीं । श्रीराम उठिला जगजेठी । धनुष्य वाहोनियां मुष्टीं । बाण गुणीं साज्जिला ॥७१॥ निर्दाळावया नक्षत्रांसी । सूर्य उगवे आकाशीं । तैसा चालिला सूर्यवंशी । राक्षसांसी निवटावया[6] ॥७२॥ आम्ही बहुत श्रीराम एकला । क्षणार्धे मारूं रंकाला । ऐसें बोलोनि एक हेळां । श्रीरामसन्मुख लोटले ॥७३॥ श्रीराम देखोनि सबळ । शस्त्रें सोडिली प्रबळ । श्रीरामें छेदिलीं तत्काळ । केले सकळ नि:शस्त्री ॥७४॥ विकट देखोनियां हाक । विक्राळ पसरोनियां मुख । श्रीरामा गिळावया देख । अवघे सन्मुख धांवले ॥७५॥ श्रीराम धनुर्धरशिरोमणी । एक बाण लावोनि गुणीं । चवदाही ओंविले बाणीं । न मागतां पाणी निमाले ॥७६॥ लक्ष्मण पडिला माझे हठीं । द्वंद्व चाळवूं आली नकटी । शस्त्र घेवोनि लागला पाठीं । आलें संकटीं पळोनी ॥७७॥ बाप लाघवी श्रीरघुनाथ । जिणोनि सकळ तुम्ही समस्त । तुचा करोनियां घात । घेईल निश्चित जनस्थान ॥७८॥ श्रीरामाचा बाणक्रम । करील राक्षसांचें भस्म । तुमचे वाढिवेचा[7] भ्रम । करील निर्भ्रम श्रीराम ॥७९॥ ऐसें ऐकतांचि वचन । खर दुर्धर कोपायमान । पाचारोनियां दूषण । रणनिशाण त्राहाटिलें ॥८०॥ अति उद्भट निशाचर । सेनासंख्या चवदा सहस्र । रथीं बैसोनियां खर । अति सत्वर युद्धार्थी ॥८१॥ दक्षिणबाहूसीं दूषण । त्रिशिरा वामबाहूसीं जाण । खरापुढे चवघे जण । रणप्रवीण महायोद्धे ॥८२॥ चवदा सहस्र निशाचरां । माजी निधडे वीर बारा । ज्यांचा सुरासुरां दरारा । इंद्र थरथरां ज्यांसी कापें ॥८३॥

चौदा हजार सैन्यासह खर, दूषण व त्रिशिरा यांचे प्रयाण : जे भयासुरत्वें जग दाटित । क्रोधदृष्टीं वीर आटित । लोहेंसीं मांस जे घोंटित । अवाळी चाटित रक्तपाना ॥८४॥ हाकें कांपती लोकालोक । विक्राळ दाढा विकट मुख । जे भयानका भयानक । तिन्ही लोक गिळूं

शब्दार्थ – १. शंख करीत, २. चांडाळादि, ३. लढाईत मोठा पराक्रम करणारे, ४. आयुधविशेष, त्याला पट्टा म्हणतात, ५. तोंडाची बडबड, ६. मारावयास, ७. पराक्रमाचा.

पाहती ॥८५॥ ऐसें दुर्धर्ष दारुण । रणवेताळ रणप्रवीण । अवघियांपुढें बारा जण[१] । कोण कोण ते ऐका ॥८६॥

दुर्गगामी पृथुबलो यज्ञशत्रुर्महाविषः । दुर्जयः परवीरघ्नः परुषः कालकार्मुकः ॥८॥
मेघमाली महाबाहुर्महास्यो लोहितांबरः । द्वादशैते महावीराः प्रतस्थुरभितः खरम् ॥९॥

पहिला दुर्गगामी तत्वतां । पृथुबळ आणि यज्ञभोक्ता । महाविष नामें चवथा । दुर्जय तो पांचवा ॥८७॥ परवीरघ्न आणि परुष । मेघमाली आणि काळकार्मुक । महाबाहु देख । दोघे अलोलिक महायोद्धे ॥८८॥ महास्य आणि लोहिताबर । दुःसह दुर्धर जुंझार वीर । यांचेनि बळें खर दुर्धर । सुरासुर गणीना ॥८९॥ यांचा भरंवसा खरासी । हे खराचे अति विश्वासी । यांचेनि बळें रावणासी । खर दृष्टींसीं आणीना ॥९०॥ श्रीरामें मारिलें चवदा जणांसी । त्यांचे घ्यावया सुडासी । बाराही जण अति आवेशीं । युद्ध श्रीरामासीं करूं पाहती ॥९१॥ नराचें अंग खराचें मुख । यालागीं खर म्हणती देख । नाक पांढरें निःशेख । तेणें आवश्यक दूषण म्हणती ॥९२॥ दूषणाचे दुष्ट सांगाती । चौघे युद्धार्थी अनिवर्ती[२] । दूर पाहती दूराकृती । विश्वासघाती ते ऐका ॥९३॥

महाकपालः स्थूलाक्षः प्रमाथस्त्रिशिरास्तथा । चत्वार एते सेनाग्रे दूषणं पृष्ठतोऽन्वयुः ॥१०॥

महाकपाल स्थूलनयन । प्रमाथी आणि त्रिदशार्दन[३] । हे दूषणाचे जीवप्राण । चौघे जण विश्वासी ॥९४॥ यांचेनि बळें संपूर्ण । यमासी दृष्टी नाणी दूषण । घातपातीं रणप्रवीण । चौघे जण चालिले ॥९५॥ तिघे पुत्र एक समस्येसी । जन्मावे आपुले कुशीं । एक वाण दिधलें तिघींसी । त्रिशिरा तिसी पुत्र जाला ॥९६॥ एवं त्रिशिरा खर आणि दूषण । एकत्र मिळोनि तिघे जण । श्रीरामासी करावया रण । रथ संपूर्ण सज्जिलें[४] ॥९७॥ सेनासंख्या चवदा सहस्र । त्यांत अनावर बारा वीर । चौघे रणघाती अति दुस्तर । भार दुर्धर चालिला ॥९८॥ निशाणें त्राहाटिल्या भेरी । चोडकीं काहळा रणमोहरी । बुरंगांचे नादगजरीं । केला वीरीं सिंहनाद ॥९९॥ हयकार थयकार जयकार । भाट गर्जती कैवार । खरासी उल्लास अपार । रथ सत्वर प्रेरिला ॥१००॥

अपशकून : सुभूमीसी समस्थळीं । घोडे अडखळले महाबळी । नेटें वळलीं भूतळीं । सारथी तळीं उलंडले ॥१॥ तंव त्याच गजबजेमाझारीं । दिवाभीत ध्वजस्तंभावरी । बैसोनियां घूं घूं करी । हांकितां वरी उडेना ॥२॥ अपशकुन आत्यंतिक । खर जाला साशंक । दचकलें त्याचें कटक । अवघे लोक गजबजिले ॥३॥ ध्वजींचे उलूकें झडपोनि तेथ । खराचे कपाळीं केले क्षत । भूकंप भूस्फोट[५] उल्कापात[६] । अशनिघात[७] होंसरला ॥४॥ ऐसा जाला चमत्कार । निशाचरीं केला हाहाकार । एकाएकीं चिंतातुर । जाले समग्र एकभूत ॥५॥ खर होवोनि सावचित्त । सांवरोनियां निजरथ । आपुला पुरुषार्थ बोलत । महोत्पात मज मिथ्या ॥६॥

तानेवौत्पातिकान्रामः सह भ्रात्रा ददर्श ह । महोत्पातानिमान्घोरानुत्थितान्घोरदर्शनान् ॥११॥

अपशकुनांबद्दल तुच्छता व शूर्पणखेला आश्वासन : अपशकुन देखोनि दृष्टीं । मागें सरो दों मनुष्यांसाठीं । हे सर्वथा बुद्धि खोटी । आम्ही जगजेठी दृढ योद्धे ॥७॥ नांही परचक्र दारुण । राजकुमार दोघे जण । त्यांसाठी अपशकुन । मानी कोण आम्हांमाजी ॥८॥ ऐसें बोलोनियां खर । रथ प्रेरिला सत्वर । उल्लासले निशाचर । भार दुर्धर चालिला ॥९॥ शूर्पणखेसी म्हणे खर । श्रीरामलक्ष्मणाचें रुधिर । तुज मी पाजीन अपार । हर्षें निर्भर ते जाली ॥१०॥ द्वंद्व साधावयाच्या कैवाडें[८] । अशुद्ध[९] प्राशावयाचे चाडें । शूर्पणखा बंधुलडिवाडें । अवघियांपुढें

---

शब्दार्थ - १. अनिवार, २. मागे न हटणारे, ३. देवांना त्रास देणारा, ४. तयार केले, ५. पृथ्वी दुभंगणे, ६. तारे पडले, ७. विजा पडणे, ८. हेतूने, ९. रक्त.

निघाली ॥११॥ देखोनियां पंचवटी । राक्षसवीर जगजेठी । शस्त्रें सज्जोनियां मुष्टीं । सक्रोधदृष्टी चालिलें ॥१२॥

भीतीमुळे ऋषींचे पलायन : श्रीरामासवें ऋषिजन । वनवासी तपोधन । राक्षसभयें गेले पळोन । जाले[1] सुलीन[1] गुंफेमाजी ॥१३॥ मग श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । सावधान राहें सीतेपासीं । मी वधीन राक्षसांसी । बाण सपिच्छी भेदून ॥१४॥ माझें सुटलिया कुऱ्हाडें । राक्षस पळतील कवणीकडे । घायें विभांडीन[2] बापुडें । रणीं रोकडे पाडीन ॥१५॥ वायु अनुकूळ आम्हांसी । प्रतिकूल राक्षसांसी । शिवा[3] सन्मुख भुंकती त्यांसी । जयो आम्हांसी वदताती ॥१६॥

श्रीराम एकटेच राक्षससैन्याशी लढतात : ऐसें बोलोनियां जाण । वेगीं धनुष्यीं वाहिला[4] गुण[4] । सन्मुख होवोनि आपण । सीती[5] बाण सज्जिला ॥१७॥ विदारावया गजगण । एकला उठे पंचानन । तैसें विध्वंसावया राक्षससैन्य । श्रीरघुनंदन चालिला ॥१८॥ निर्दळावया खद्योतासी । सूर्य उगवे आकाशीं । तैसा श्रीराम सूर्यवंशीं । राक्षसांसी अंतक ॥१९॥ सूर्योदयीं खद्योत मावळती । शशीं चंद्र नक्षत्रें अस्ता जाती । तेंवी सेना निर्दळिता श्रीरघुपती । रणीं निमती खरादिक ॥१२०॥

श्रीरामांच्या शौर्यामुळे सीतेला आनंद व अभिमान : सीता पाहे श्रीरामझुंज । तिचें लक्ष्मणासी चोज । चढविली श्रीरामसेज । रणसमाज देखावया ॥२१॥ कवित्वमुद्रा अनारिसी । सीता सौमित्र धाडिलीं गुंफेसी । श्रीराम न भी राक्षसांसी । तो कां तियेसी लपवील ॥२२॥ श्रीराम बाण ओढितां ओढी । राक्षससेना ते हडबडी । एकामागें एक दडी । देवोनि बापुडीं राहिलीं ॥२३॥ श्रीराम देखतांचि दृष्टी । थरकांप सुटला पोटीं । मूत्रप्रवाह तळवटीं । शस्त्रें मुष्टीहूनि गळती ॥२४॥ व्याघ्र देखोनियां डोळां । भयें अजा होती गोळा । तैसे जालें राक्षसां सकळां । श्रीराम मरगळा[6] देखोनी ॥२५॥

सैन्यं तु स्थितमालोक्य निश्चलं पर्वतोपमम् । पार्श्वस्थं दूषणं क्रुद्धं खरो वचनमब्रवीत् ॥१२॥

खराचे दूषणाला प्रोत्साहन : राक्षससैन्य दुर्धर प्रबळ । राहिलें देखोनि निश्चळ । खरासी कोप आला प्रबळ । बोले तत्काळ दूषणासी ॥२६॥ आमचा सैन्यसंभार । निश्चळ दिसे पर्वताकार । पुढें न दिसतां दुस्तर । सैन्य एकत्र कां जालें ॥२७॥ सावज देखोनियां दृष्टीं । जेवी अजा होती एकवटी । तेवीं सैन्य थोकलें पृष्ठीं । पुढें वाट कां फुटेना ॥२८॥ ऐसें खरवचन ऐकोनि स्पष्ट । मग दूषण चालिला घडघडाट । त्याच्या रथासी न फुटे वाट । सैन्य सकट कोंदलें ॥२९॥ रथीं वीर गर्जती पूर्ण । परी पुढे न चालती गेलिया प्राण । सेनामुखीं येतां दूषण । तंव श्रीरघुनंदन देखिला ॥१३०॥

राक्षसांना श्रीराम कसे दिसले? : मुकुट कुंडलें रत्नमेखळा । टिळक रेखिला पिंवळा । आजानुबाहु घनसांवळा । कमळमाळा शोभती ॥३१॥ तडित्प्राय[7] कांस गोमटी । अंगी चंदनाची उटी । धनुष्यबाण सज्जोनि मुष्टीं । उभा जगजेठी रणरंगीं ॥३२॥ पाउलें आरक्त सुकुमार । वांकी अंदुवांचा गजर । नांदे कापती सुरासुर । त्यासमोर कोण राहे ॥३३॥ देखतां चळीं कांपे दूषण । सुटलिया श्रीरामाचा बाण । अवश्य घेईल माझा प्राण । आला पळोन खरापासीं ॥३४॥ सेनामुखीं श्रीरघुनाथ । जैसा कोपला कृतांत । सैन्य चळचळां कांपत । त्यासी पुरुषार्थ चालेना ॥३५॥ प्रळयाग्नीच्या जैशा शिखा[8] । तैसे त्याचे बाण देखा । दृष्टीनें जाळूं पाहे कटका[9] । श्रीराम नेटका झुंजार ॥३६॥ दृष्टीनें देखतांचि जाण । जीवासी जीवें मारी संपूर्ण । त्यापुढें राहील कोण । अरिमर्दन श्रीराम ॥३७॥ श्रीराम देखतांचि जाण ।

---

शब्दार्थ - १. लपले, २. मारीन, ३. कोल्ही, ४. दोरी चढविली, ५. धनुष्यावर, ६. संहारक, मोठा शूर, ७. विजेसारखी, ८. ज्वाळा, ९. सैन्याला.

आपभयें पळे प्राण । मग तेथें केउती आंगवण । रणगर्जन श्रीराम ॥१३८॥ ऐकोनि दूषणाची मात । पहावया श्रीरघुनाथ । खरें प्रेरिला पैं रथ । अति गर्वित युद्धार्थी ॥१३९॥ एकाजनार्दना शरण । श्रीरामराक्षसां घोर रण । राम करील राक्षसकंदन । श्रोतीं अवधान मज द्यावें ॥१४०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां खरदूषणश्रीरामयुद्धप्रारंभो नाम नवमोऽध्याय: ॥९॥ ओंव्या ॥१४०॥ श्लोक ॥१२॥ एवं ॥१५२॥

## अध्याय दहावा

### दूषण राक्षसाचा वध

श्रीरामचंद्राय नम: । युद्धार्थी चालिला खर । देखोनि उभा श्रीरघुवीर । अवघे खवळले निशाचर । शस्त्रसंभार सुटले ॥१॥

ततस्ते क्रूरकर्माणं क्रुद्धा: सर्वे निशाचरा: । रामं नानाविधै: शस्त्रैरभ्यवर्षन्त दुर्जयम् ॥१॥

**श्रीरामांचे युद्धकौशल्य :** श्रीराम रणरंगधीर । क्रूरकर्मी निशाचर । मिळोनि समग्र सैन्यसंभार । शस्त्रें अपार वर्षले ॥२॥ गदा मुद्गल तोमर त्रिशूळ । परशु पट्टिश महाशूळ । कातिया कुन्हाडी परिघ मुसळ । लहुडी स्थूळ महाघात ॥३॥ खड्ग हाणिती खणखणां । बाण सुटती सणसणां । वोडणें[1] वाजती दणदणां । लागली निशाणां एक घाई ॥४॥ श्रीराम एकाकी एकला । गेला तुटला निवटला । शस्त्रसंपातीं[2] आटला । म्हणती निमाला नि:शेष ॥५॥ एक म्हणती खडविखंड[3] । एक म्हणती नवखंड । एक म्हणती शतखंड । शस्त्रीं उदंड दंडिला ॥६॥ महावीरांचा घडघडाट । आणि शस्त्रांचा कडकडाट । नाहीं पळावयालागीं वाट । झाला सपाट श्रीराम ॥७॥ रुधिर प्राशावया अति प्रीतीं । शूर्पणखा येथें आली होती । तिच्या तोंडी पडली माती । अशद्ध[4] क्षितीं आटलें ॥८॥ श्रीराम निमाला नि:शेष । वृथा घाय हाणिती राक्षस । रणकाविरें[5] लागलें त्यांस । ऐसें बहुवस जल्पती ॥९॥ जेंवी पर्जन्याच्या धारा । झांकोळती गिरिवरा । तेंवी झांकिलें श्रीरामचंद्रा । शस्त्रसंभारीं राक्षसीं ॥१०॥ श्रीराम चित्पर्वत अमोघ । राक्षसमंडळी महामेघ । शस्त्रधारांनीं झाकोळलें सर्वांग । लौकिकीं सांग दिसेना ॥११॥ श्रीराम चिदादित्य तेज गाढें । राक्षससेना तें महामेहुडें[6] । झांकोळला चहूंकडे । तें यश मूढें मिरविती ॥१२॥ जेंवी हृदयीं आत्मा गुप्त । कीं अभ्रांमाजी[7] भास्वत[8] । तेवीं शस्त्रांमाजी श्रीरघुनाथ । सावचित्त धनुष्येसीं ॥१३॥ झांकोळिल्या अभ्रघन । जेंवी तोडी प्रभंजन[9] । तेंवी राक्षसशस्त्रांतें छेदोन । राम चिद्भानु प्रकटला ॥१४॥

**राक्षसांचा संहार :** देखोनि राक्षसांचे बळ । रामें सोडिलें शरजाळ । त्यांची शस्त्रें छेदोनि सकळ । वीर प्रबळ खोंचले ॥१५॥ एक बाण ओढितां ओढी । बाण सुटती लक्षकोडी । शत्रूंचीं शस्त्रें छेदोनियां गाढीं । वीरमुरकुंडी पाडिल्या ॥१६॥ उरीं शिरीं दोहीं करीं । बाण भेदलें भुजांवरी । सपिच्छी बुडाले शरीरीं । वीरां महामारी श्रीराम ॥१७॥ वल्गती मेला गेला निमाला । तंव तो श्रीराम दादुल्यांचा दादुला । वीरां निवटीत उठिला । अंत पुरला राक्षसांचा ॥१८॥ करूं जातां राक्षस घाता । शस्त्रें छेदोनी तोडी हाता । वीर मिरविती पुरुषार्था । तंव करी नि:पाता बाणाग्रें ॥१९॥ मागें वीर सरों जातां । तंव बाण वाजती त्यांचे माथां । सन्मुख होतां श्रीरघुनाथा । जीवघाता करितसे ॥२०॥ राहें साहें वीर गर्जत । त्यांची जिव्हा छेदी सदंत । ऐसा बाणें मांडिला आकांत । वीर विख्यात श्रीराम ॥२१॥ कंकपत्र बर्हपत्र । हंसपत्र

---

शब्दार्थ - १. ढाली, २. शस्त्रप्रहारांनी, ३. तुकडे तुकडे, ४. रक्त, ५. रणसंबंधीं वेड, ६. मेठा मेघ, ७. ढगांत, ८. सूर्य, ९. वारा.

सुवर्णपत्र । बाणें भेदिले वीर विचित्र । रणीं मयूर नाचती ॥२२॥ भोंवतां बाणांचा वळसा । सैन्य पाडिलें धारसा[1] । महावीर पावलें त्रासा । उरी राक्षसां उरों नेदी ॥२३॥ श्रीरामाचा निजबाण। राक्षसरुधिरीं करोनि स्नान । देतसे मोक्षाचें दान। पापी पावन त्याचेनि ॥२४॥ श्रीराम रणरंगधीर । राक्षससैन्या केला भार । रणीं उठिला हाहाकार । देखोनि खर कोपला॥२५॥

तुं दृष्ट्वा सगुणं चापमुद्यम्य खरनिःस्वनम् । रामस्याभिमुखं सूतं चोद्यतामित्यचोदयत् ॥२॥

स खरस्याज्ञया सूतस्तुरगान्समचोदयत् । यत्र रामो महाबाहुरेको धुन्वन्धनुः स्थितः ॥३॥

खर व बारा वीर पुढे येतात : देखोनि श्रीरामपुरुषार्थ । खर सारथियातें म्हणत । वेगें प्रेरीं[2] गा माझा रथ । जेथें रघुनाथ रणरंगीं उभा ॥२६॥ कोप चढला चतुर्गुण । वेगें धनुष्या वाहिला गुण । आजी रामासीं करीन रण । आंगवण पहा माझी ॥२७॥ देखोनि धुरेचा कडकडाट । सारथियें वारुवां[3] दिधला साट[4]। रथ चालिला घडघडाट । तंव देखिला पुढें उद्भट श्रीराम ॥२८॥ आजनुबाहु धनुर्धारी । वीरांतें करित महामारी । असो खर देखोनि रहंवरी । श्रीराम टणत्कारी धनुष्यातें ॥२९॥ श्रीरामधनुष्याच्या टणत्कारें । दुमदुमिलीं गिरिकंदरें । नादें कोंदलें अंबर । निशाचरें भयभीत ॥३०॥ एक नादें जाली वेडीं । एक तीं केवळ बापुडीं । एकांची वळली मुरकुंडी । नांदें पाडापाडी मांडिली ॥३१॥ ऐसा देखोनि श्रीरघुवीर । खरासी ओढवलें दुस्तर । त्याचे कैवारी अति दुर्धर । बाराही वीर धांविन्नले ॥३२॥ नावानिगे[5] राक्षसांत । ज्यांसी नित्य कांपिजे कृतांत । तिहीं पडखळिला[7] रघुनाथ । स्वामिकार्यार्थ दृढयोद्धे ॥३३॥ वोढण खांडे घेवोनि जाण । उग्रनामा आला आपण । स्वामिकार्यीं वेंचावया प्राण । रणप्रवीण बाराही ॥३४॥ पृथलव यज्ञभुक्तां । महाविष दुर्जय चोथा । धनुष्यबाण सज्जोनि हातां । युद्धीं रघुनाथा सन्मुख ॥३५॥ परवीरघ्न पुरुषबळी । काळकार्मुक मेघमाळी । चवघे वीर आतुर्बळी । शूळत्रिशूळी महायोद्धे ॥३६॥ महाबाहु लोहितांबर । महाआस्य अति दुर्धर । गदार मुद्गल घेवोनि तोमर । रणीं रघुवीर पडखळिला ॥३७॥ गदा मुद्गल परशु पट्टिश । बाण मोकलिले बहुवस । शस्त्रें सोडिलीं असमसाहस । श्रीराम राजस देखोनी ॥३८॥ बारा जण कपटरासी । म्हणोनि आवडती खरासी । कैसें कपट तयांपासीं । सावकासीं अवधारा ॥३९॥ गुप्तघाती आकाशपाती । एक ते अतर्क्यविघाती । एम मारक निमेषस्थिती । प्राणवृत्ति पांचवी ॥४०॥ संचरोनि नेत्रांतरीं । शूळें जिव्हार विदारीं । एक रिघोनि कर्णकुहरीं । वर्मी मारी शस्त्रातें ॥४१॥ एक तो खड्ग हातवसी[6] । अंतरीं संचरे मनोवेगेंसीं । शस्त्रें हाणोनी हृदयासी । मारी वीरांसी अति दृष्ट ॥४२॥ तों चौघे उरले कपटराशी । वीर वेढोनि चौपासीं । गुप्तशस्त्रें कासाविसी । करोनि वीरासी मारिती ॥४३॥ ऐसे हे वीर बारा जण । कपटयोद्धे प्रवीण । रामासी मारावया जाण । अवघे जाण चालिले ॥४४॥ त्यांचा धरोनि आधार । चालिला राक्षसांचा संभार । धरा मारा गर्जती थोर । श्रीरामासमोर लोटले ॥४५॥

कपटप्रवीण बारा राक्षसांचा दमनीशक्तीने केलेला संहार, त्यामुळे राक्षसांची दाणादाण : श्रीराम धनुर्धारी विचक्षण । मारावया बारा जण । दमनी निजशक्ती दारुण । अभिमंत्रोन सोडिली ॥४६॥ कपटी निर्दाळावया निश्चितीं । अनिवार शस्त्र दमनी चिच्छक्ती[9] । रामें सोडिली अलक्षगती । शस्त्रे ख्याती लाविली ॥४७॥ दमनी चिच्छक्ती देखोनी । कपटियां पडली मोहिनी । जाली बाराही जणां भंगाणी[10] । प्रताप रणीं चालेना ॥४८॥ बाण भरले नाकीं

शब्दार्थ - १. तीव्र बाणाची, २. हाक, सोड, ३. चाबुक, ४. रथात, ५. प्रख्यात, नाणवलेले, ६. यम, ७. गाठला, ८. हातात घेतो, ९. ज्ञानशक्ती , १०. नाश.

वदनीं । बाण भरले कानीं नयनीं । बाण भरले हृदयभुवनीं । बाणीं खिळोनी पाडिले ॥४९॥ श्रीरामाच्या बाणांपुढें । केउते पळतील बापुडे । वाट न दिसे मागेंपुढे । जीवीं कुऱ्हाडे पैं भेदिले ॥५०॥ वोडणें[1] खिळिलीं उरासीं । कटी छेदिल्या कटारांसीं । शिरे छेदिली मुकुटासीं । हात शस्त्रेंसीं छेदिले ॥५१॥ छेदिले स्थूळ[2] लिंग[2] कारण । श्रीरामें छेदिले महाकारण। जीवें मारोनि संपूर्ण । बाराही जण निर्दळिले ॥५२॥ कपटें जिंतितां श्रीरामासी । कपटें मारिलें कपट्यांसी । श्रीराम प्रतापाची राशी । राक्षसांसी नाटोपे ॥५३॥ करोनि बारांचा निःपात । मग मिसळला सैन्यांत । भोंवता बाणांचा आवर्त[3] । आला अंत राक्षसांसी ॥५४॥ रणीं खवळला श्रीरघुनाथ । अनिवार बांणसंपात[4] । जेथींचा तेथें राक्षसघात । रणीं आवर्त वीरांसी ॥५५॥ एक खोंचले सन्मुख घायीं । एक पडिले ठायींच्या ठायीं । एक सपाट छेदोनि पायीं । पडिल्या भुई वीरश्रेणी ॥५६॥ शिरें छेदोनि चेंडूफळी करणें । खेळतु रुधिराचें शिंपणें । रणवसंतु माजवणें । किंशुक[5] फुलणें बाणांचें ॥५७॥ वीर कुंथती अपार । तेवीच कोकिळापंचमस्वर । श्रीरामें केला महामार । लहान थोर कुंथती ॥५८॥ न साहवती श्रीराम-बाण । राक्षससेना पलायमान । देखोनि धांविन्नला दूषण । आश्वासून सैन्यातें ॥५९॥

तान्सर्वान्धनुरादाय समाश्वास्य च दूषणः । अभ्यधावत्सुसंकुद्धः कुद्धं क्रुद्ध इवान्तकः ॥४॥
निवृत्तास्तु पुनः सर्वे दूषणाश्रयनिर्भयाः । राममेवाभ्यधावन्त सालतालशिलायुधाः ॥५॥

रणातून पळणाऱ्या राक्षससैन्यास दूषणाचे आश्वासन : दूषण म्हणे राक्षसदळा । रण देखोनी केंवी पळा । आश्वासोनियां सकळां । सन्नद्ध केला दळभार ॥६०॥ दूषण अवलोकी राक्षसांसी । म्हणे तुम्हीं राहावें माझे पाठीसीं । मी वधीन श्रीरामासी । अति आवेशीं धांविन्नला ॥६१॥ धरोनि दूषणाचें बळ। परतले राक्षसदळ । श्रीराम शस्त्रें छेदावया सकळ । शाळताळशिळायोद्धें[6] ॥६२॥ श्रीरामासीं युद्ध करी दूषण । राक्षय वर्षती पाषाण । शाळताळवृक्ष जाण । अति सत्राणें हाणिती ॥६३॥

श्रीरामांनी दूषणाचा रथ, घोडे व सारथी यांना मारले : श्रीराम रणरंगी प्रवीण । लघुलाघवें वर्षे बाण । तोडून शाळ ताळ पाषाण । बाणें दूषण केला कासाविस ॥६४॥ एक निवारी जंव बाण । तंव लक्ष येती आन । धनुष्य पाडिलें तोडून । भाते झाडून पाडिले ॥६५॥ बाणांमागें येती बाण । घेतला राक्षसांचा प्राण । मूर्च्छित पाडिला दूषण । रणकंदन वीरांसी ॥६६॥ केव्हां भात्याचा बाण काढी । केव्हां जोडी केव्हा सोडी । अलक्ष्य लक्ष्याची[7] परवडी[7] । रणीं करवडी[8] पाडिली ॥६७॥ वीर खोंचले वितंड । मिथ्या दूषणाचें बळ बंड । एकही साहों न शके कांड । काळें तोंड दूषणाचें ॥६८॥ ऐकोनि वीरांचे वचन । दूषण झाला लज्जायमान । सामर्थ्ये मूर्च्छा सांवरोन । रथारोहण तेणें केलें ॥६९॥

राक्षसांस्तान्रणे भग्नान्दृष्ट्वा रामेण धीमता । रथस्थो दूषणो रामं शरवर्षैरवाकिरत् ॥६॥

दूषणाशी भयंकर रणकंदन व त्याच्याच शस्त्राने त्याचा वध : राक्षससेना देखोनि भग्न । दूषण झाला कोपायमान । रागें रथावरी बैसोनि जाण । वर्षे बाण अनिवार ॥७०॥ शतसहस्त्र लक्षकोडी । बाणांमागें बाण सोडी । श्रीराम निमेषार्धे तोडी । धनुष्य पाडी छेदोनी ॥७१॥ क्रोधें तप्त झाला दूषण । शक्ति गदा पडताळोन । सर्वेचि रामें दहा बाण । अति दारुण सोडिले ॥७२॥ चारी वारू चहूं बाणीं । विंधोनि पाडिले धरणीं । तोडोनि सांटा चाकें दोनी । तीन

---

शब्दार्थ - १. ढाला, २. चार प्रकारचे देह, वेढा, ४. बाणप्रहार, ५. पळस, ६. शाळावृक्ष, ताळवृक्ष व पाषाण घेऊन लक्षणारे, ७: बाणांचे भक्ष्य झालेल्या राक्षसांची रांग, ८. कचरा.

बाणीं छेदिलीं ॥७३॥ एकें ध्वज पाडिला क्षितीं । एके रथ एकें सारथी । श्रीरामें लाविली ख्याती । केला विरथी दूषण ॥७४॥ छेदोनियां रथ सारथी । रणीं दूषण केला पदाती[1] । कोपें गदा घेवोनि हातीं । श्रीरामाप्रती धांविन्नला ॥७५॥ जाणोनि राक्षसांच्या अति मदा । मिरविशी यशाच्या आनंदा । माझी साहें पाहें गदा । तरी मी योद्धा तुज मानीं ॥७६॥ दूषणासीं करिता रण । रणीं रामाचा घेईन प्राण । झाडीन वाढिवेचा अभिमान । गदा घेवोनि चालिला ॥७७॥ श्रीराम म्हणे नांव दूषण । सांगतां न लाजसी आपण । दूषण खरासी भूषण । निंद्य वदन दोघांचे ॥७८॥ धर्में दूषण कर्में दूषण । नामें दूषण कामें दूषण । दूषणासी बळ दूषण । आंगवण तुज कैचीं ॥७९॥ दूषण म्हणे जल्पसी किती । गदा घेवोनियां हाती । पतंग धांवे दीपाप्रती । तैसे गतीं धांवला ॥८०॥ गदा हाणितांचि दारुण । विंधोनि सुवर्णपत्री बाण । श्रीरामें गदा केली शतचूर्ण । रागें दूषण दांत खाय ॥८१॥ दांत खावोनि करकरां । शूळ घेवोनि धांवे सामोरा । घायें मारीन रघुवीरा । क्रोधें थरथरां कांपत ॥८२॥ बाण सोडोनि तिधारा । शूळ उडविला अंबरा । करोनियां शकलें बारा । श्रीराम निशाचरावरी पाडी ॥८३॥ श्रीरामें सर्व शस्त्रें केली मोघ । देखोनी दूषणा आला राग । वज्रपाय घेतला परिघ । अति दूर्धर रणमारा ॥८४॥ वीरभद्राचें वरद पूर्ण । परिघ सोडिल्या हरी प्राण । त्यासी न चले निवारण । परिघ-तें निर्वाण शस्त्रांचें ॥८५॥ अष्टौ घंटा घवघवित । वीररक्तें अति आरक्त । दूषण धांवे परिघ-हस्त । श्रीरघुनाथ वधावया ॥८६॥ परिघ देखोनि अनिवार । स्वर्गी देवां हाहाकार । सुरनरांलागीं विचार थोर । केवी रघुवीर वांचेल ॥८७॥ श्रीराम धुनर्वाडा निजगडी । दूषण परिघ जंव सोडी । तंव परिघेंसीं बाहु खुडी । बाण निर्वडीं विंधोनी ॥८८॥ परिघासह बाहु खुडून । तोचि परतोनियां बाण । हृदयीं भेदोनियां पूर्ण । रणीं दूषण पाडिला ॥८९॥ दूषण पडतां भूमिगत । परिघें वरिला श्रीरघुनाथ । येवोनि राहिला भात्याआंत । रणीं प्रमाथा वधावया ॥९०॥ वीरभद्रशस्त्रदेवता । तीही प्रसन्न श्रीरघुनाथा । अमोघ परिघ आला हाता । रणीं प्रमाथा वधावया ॥९१॥ दूषण पडतांचि रणीं । हाहाकार गर्जे गगनीं । धाकें कांपती वीरश्रेणी । श्रीराम रणीं रणरुद्र ॥९२॥

**दूषणाचा वध झालेला पाहून त्याचे तिघे साथीदार पुढे आले :** रणीं पडतां दूषण । त्याचे कैवारी तिघे जण । श्रीरामासीं करावया रण । अति दारुण चालिले ॥९३॥ महाकपाळ आणि स्थूळाक्ष । तिसरा प्रमाथी राक्षस । युद्धीं हांकिती श्रीरामास । अति कर्कश चालिले ॥९४॥ राक्षसांमाजी अति दुर्धर । शूळ पट्टिश परशु थोर । तिघां हातीं हतियार । श्रीरामासमोर लोटले ॥९५॥ आमुचा स्वामी पाडिला ठायीं । तुजही पाडूं शस्त्रघायीं । शस्त्रें सोडिलीं लावलाहीं । त्रिपुटी पाही तिघांची ॥९६॥ एक तो चालिला सन्मुख । एक पाठीसी हाणी विमुख । एक तो आकाशीं देख । शस्त्रें अनेक वर्षती ॥९७॥ श्रीराम पाठिमोरा देखणा । हें विंदान न कळे कोणा । विंधोनियां विकट बाणा । आणिला रणा प्रमाथी ॥९८॥

**महाकपाळ, स्थूळाक्ष व प्रमाथी या तिघांना श्रीरामांनी ठार केले :** हातीं घेवोनियां शूळ । सन्मुख आला महाकपाळ । शूळ छेदोनि तत्काळ । कंठनाळ निवटिलें ॥९९॥ गगनीं गर्जतां स्थूळाक्ष । त्याचे बाणीं छेदोनि अक्ष । तळीं पाडोनियां देख । घायीं निःशेख मारिला ॥१००॥ वक्री शनि भौम केतु । सूर्योदयीं होती अस्तु । तैसा राक्षसांसी अंतु । श्रीरघुनाथा रणरंगीं ॥१॥

---

शब्दार्थ – १. पायी चालणारा, २. शौर्याचा, मोठेपणाचा, ३. अर्थ, निकामी, ५. कौशल्याने, ६. निष्फल न होणारा, ७. बोलावितात आव्हान देतात, ८. शिर, मस्तक, ९. तोडून टाकिले, १०. डोळे.

गृहस्थ अतिथी सन्मान । तैसेचि श्रीराम आपण । तिघां देवोनि शरासन । तिघे जण सुखी केले ॥२॥ सुवर्णपत्री सोडोनि शर । प्रमथा मथन केलें थोर । दहा बाणीं त्रासिले महावीर । निशाचर पळताती ॥३॥

सहकारी राक्षसांचा विध्वंस : एके बाणें शतानुशत वीर । पांच बाणीं मारी सहस्र । दहा बाणीं दहा सहस्र । घोरांदर राक्षसां ॥४॥ सकुंडल छेदोनि शिर । आयुधांसहित ताडिले कर । कवचेंसी भेदिलें शरीर । पाडिले वीर ब्रीदाचे ॥५॥ बाबरझोटीचे अपार । बाणीं पाडिले महावीर । वाहती रुधिराचे पूर । श्रीरामचंद्र क्षोभला ॥६॥ श्रीरामबाणांच्या कडाडीं । राक्षसें पळती भयें बापुडीं । अति दीन होवोनि वेडीं । बाणझडाडीं चरफडती ॥७॥

चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । हतान्येकेन रामेण मानुषेण पदातिना ॥७॥

रथेंवीण पायीं रघुवीर । चवदा सहस्र निशाचर । रणीं मारिले अति दुर्धर । जयांसी सुरनर कांपती ॥८॥ राक्षसांमाजी बळी दूषण । त्यासी भीतसे रावण । परिघ अनिवार दारुण । रामें आपण निर्दळिला ॥९॥ रणीं निर्दळिले निशाचर । दूषण मारिला महावीर । श्रीराम धनुर्वाडा[1] दुर्धर । कोण समोर राहील ॥११०॥ राक्षसां जाला थोर मार । कोपें चालिला पैं खर । त्रिशिरा कोपला दुर्धर । तेणें रघुवीर पडखळिला[2] ॥११॥ करोनियां राक्षसघाता । केउता जासील तूं आतां । राहें साहें श्रीरघुनाथा । शस्त्रसंपाता[3] पेटला ॥१२॥ निर्दळोनियां निशाचरां । रणीं पाडोनियां मुख्य धुरा । गर्व धरिसी श्रीरघुवीरा । तो मी त्रिशिरा झाडीन ॥१३॥ श्रीरामत्रिशिरां झाली भेटी । दोघे महाक्रोधदृष्टी । दोघीं धनुष्य वाहोनियां मुष्टीं । दोघेही हट्टी महावीर ॥१४॥ एकाजनार्दना शरण । त्रिशिर्‍याचें युद्ध दारुण । श्रीरामरण अति पावन । मोक्षसाधन साधका ॥१५॥ श्रीरामकथेचे अक्षर । क्षराक्षरातीत[4] पर । मुक्त करावया निशाचर । कृपेनें दुर्धर कोपला श्रीराम ॥१६॥ श्रीरामकथा पवित्र तीर्थ । श्रोते वक्ते नित्यमुक्त । एकाजनार्दनीं निर्मुक्त । कथामृत श्रीराम ॥११७॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणेअरण्यकांडे एकाकारटीकायां दूषणवधो नाम दशमोऽध्यायः ॥१०॥ ॥ओव्या ॥११७॥ श्लोक ॥७॥ एवं ॥१२४॥

## अध्याय अकरावा

### त्रिशिरा व खर राक्षसांचा वध

दूषणाच्या वधानंतर खर व त्रिशिरा हे पुढे येतात; त्यांच्या वल्गना : श्रीरामचंद्राय नमः । श्रीरामें मारिल्या सैन्य धुरा । तेणें दुर्धर कोप आला खरा । त्यासी पुसोनियां त्रिशिरा । श्रीरामचंद्रावरी आला ॥१॥ खर म्हणे त्रिशिर्‍यासी । रणीं मर्दिलें दूषणासी । म्हणोनि भिवो नको रामासी । तुझे पाठीसीं मी आहें ॥२॥ मनुष्य खाजें[5] राक्षसांसी । त्याचें भय काय आम्हांसी । काटें देखोनि फणसासी । खाणारासी भय नाहीं ॥३॥ चिरोनि फणसाचे कांटे । काढोनि अमृताचे सांठे । मग सेविती घटघटें । युद्धसंकटें तेंवि श्रीराम ॥४॥ श्रीराम बाणकटकेंसीं । अति दुर्धर राक्षसांसी । तो गोड भखितां आम्हांसी । रणीं रामासी निर्दाळीं ॥५॥ ऐकोनि खराचें वचन । दुसरा खर भुंके जाण । तैसा त्रिशिरा आपण । की गर्जन तिहीं मुखीं ॥६॥ वेंगीं बैसोनियां रथा । राहें साहें म्हणे रघुनाथा । धनुष्य मर्दोनियां हाता । होय वर्षता बहु बाण ॥७॥

ततः प्रहृष्टस्त्रिशिराश्चापमुद्यम्य वीर्यवान् । गच्छ युद्धयेत्यनुज्ञातो राघवाभिमुखो ययौ ॥१॥

त्या दोघांची गर्वोक्ती, श्रीरामांचे प्रत्युत्तर : खरासी म्हणे त्रिशिरा । कोण पाडू रणीं रघुवीरा ।

---

शब्दार्थ - १. धनुर्विद्यानिपुण, २. गाठिला, ३. शस्त्रे सोडण्याकरिता, ४. जडाजडाहून विलक्षण, ५. खाद्य.

बाणीं खिळोनि करीन पुरा । शस्त्रसंभारा तूं पाहें ॥८॥ मग त्रिशिरा म्हणे श्रीरघुनाथा । वधोनि राक्षसां बहुता । पळों नको गा मागुता । तुज मी आतां वधीन ॥९॥ लहाना मत्स्या मत्स्यु आकळी । तेंवी राक्षसां केली त्वां होळी । त्या तुज मी सगळेंचि गिळीं । रामा तुज मी गिळूं आलों ॥१०॥ श्रीराम म्हणे त्रिशिराप्रती । खराश्रयोगें जन्मप्राप्ती । तो तूं खराचा सांगाती । वेसरउत्पत्ती[1] भारवाही[2] ॥११॥ तूं भारवाही वेसर खरा । वाहसी त्रिशिरांच्या भारा । तिहीं मुखीं जल्पसीं सैरा । नाहीं विचारा एक मुख ॥१२॥ त्रिजात त्रिशिरांचा तूं राक्षस देख । त्रिमुखा युद्धीं नव्हे एक मुख । पळोनि जासी खराभिमुख । वल्गना थुंकथुंकसी ॥१३॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । त्रिशिरा वर्षे अमित बाण । आच्छादोनि श्रीरघुनंदन । बाणीं गगन व्यापिलें ॥१४॥ देखोनि श्रीराम बाणीं आच्छन्न[3] । राक्षसांचें शेष सैन्य । अवघें परतलें गर्जोन । रघुनंदन निर्दळिला ॥१५॥

श्रीरामबाणांनी रथ, घोडे व सारथी यांचा नाश झाल्यावर त्रिशिरा विरथी होऊन लढतो : त्रिशिरा तूं योद्धा भला भला । रणीं श्रीराम निवटिला । राक्षसीं गजबजु पैं केला । तेणें क्षोभला श्रीराम ॥१६॥ श्रीरामें विंधितांचि जाणा । बाण आदळती बाणां । भाळीं वाजती खणखणा । ठिणग्या गगना न माती ॥१७॥ श्रीरामबाणांचा कडकडाट । राक्षसबाणांचा अति नेट । घायीं उठला हव्यवाट[4] । दोघे सुभट महायोद्धे ॥१८॥ गरुड नखें सर्प चिरी । तेंवी श्रीराम बाणें बाण विदारी । तोडोनियां भूमीवरी । भुजंगाकारीं पसरिले ॥१९॥ राक्षसांचे बाणजाळ । वायु तोडी जेंवी आभाळ । तेंवी श्रीरामें तोडिलें सकळ । त्रिशिरा प्रबळ कोपला ॥२०॥ त्रिशिरा[5] ती बाणीं रघुनाथा । लागवेगीं विंधिलें माथां । तेणें श्रीरामा नव्हेचि व्यथा । म्हणे गंधाक्षता मज केली ॥२१॥ तीं बाणांची मऊ मवाळी[6] । रणीं अर्पिली पुष्पांजळी । तुज पूजीन बाणजाळीं । श्रीराम महाबळी क्षोभला ॥२२॥ तुझे म्यां साहिले तीन बाण । माझे तूं साहें शर दारुण । ऐसें बोलोनि श्रीरघुनंदन । चौदा बाण सोडिले ॥२३॥ चौदा विद्यांची अति गती । तैसी बाणांची निजशक्ती । निवरणाची न चले युक्ती । धनुष्य हातींचें छेदिलें ॥२४॥

कार्तिकस्वामीच्या वराने प्राप्त झालेली शक्ती हातात घेतो : चहूं बाणीं चारी वारू । एकें सारथियासी मारू । एकें ध्वज तोडिला सत्वरू । एकें रहंवरू छेदिला ॥२५॥ विरथ त्रिशिरा आणिला भुयीं । श्रीरामावर धांवला पायीं । त्यासी सामर्थ्य न चले कांहीं । निर्वाण पाहीं मांडलें ॥२६॥ कुमारवरदाचे[7] निजप्राप्तीं । त्रिशिऱ्यापासीं निर्वाणशक्ती । ते तंव सज्जूनियां हातीं । श्रीरामप्रति धांविन्नला ॥२७॥

त्यामुळे सर्वजण सचिंत : कुमारशक्ति त्रिशिऱ्याहातीं । देखोनि सुरवर कांपती । भूतळीं ऋषीश्वर धांवती । केंवी रघुपति वांचेल ॥२८॥ कुमारशक्तिमाराभेणें[8] । इंद्र चळीं-कांपे आपण । धाकें कांपती रुद्रगण । यम वरुण कांपती ॥२९॥ धाकें कांपती सुरासुर । धाकें कांपती यक्ष किन्नर । शक्ति अतिशयेसीं दुर्धर । केंवी श्रीरघुवीर साहेल ॥३०॥ शस्त्र दुर्धर त्रिजगती । केंवी श्रीरघुवीर साहेल ॥३०॥ शस्त्र दुर्धर त्रिजगतीं । त्रिशिरा क्षोभोनियां चित्तीं । श्रीरामाच्या निजघातीं । सक्रोध शक्तीं मोकलिली[9] ॥३१॥

त्रिशिऱ्याने सोडलेली शक्ती श्रीरामांना वंदन करून त्यांच्याच भात्यात जाते : सर्वशक्तींची श्रीराम शक्ती । त्यावरी न चले शक्तीची गती । शक्तीनें वंदोनि श्रीराममूर्ती । चरणीं विश्रांति पावली ॥३२॥ शस्त्रदेवता म्हणे आपण । होतां श्रीराम दर्शन । माझें झालें बंदीमोचन । काळें वदन

---

शब्दार्थ - १. घोडा व गर्दभ यापासून झालेला (खेचर), २. ओझे वाहणारा, ३. झाकलेला, ४. अग्नी, ५. त्रिशिऱ्याने, ६. मृदू, ७. कार्तिकस्वामीच्या वराचे, ८. भेणे = भयाने, ९. सोडिली.

त्रिशिऱ्याचें ॥३३॥ करावया राक्षसघात । शक्ति रिघाली श्रीरामभात्यांत । देखोनि त्रिशिऱ्यासी चिंता अद्भुत । विपरीत अवस्था ओढवली ॥३४॥ माझी जे कां निजशक्ती । ते वश्य झाली श्रीरामाप्रती । आतां आमुची खुंटली गती । राक्षसशांति श्रीरामें ॥३५॥

**श्रीरामांच्या सुवर्णपंखी बाणाने त्रिशिराचा गोंधळ व त्यातच त्याचा अंत :** रणीं मारणें का मरणें । हा निश्चयो करोनि तेणें । खर्ग तुळोनि तळपणें । हाकी[1] सत्राणें श्रीरामा ॥३६॥ श्रीरामें सोडिला त्रिधरा । तेणें तोडिल्या खर्गधारा । त्रिशिऱ्यासी लागला पिसारा । तेणें अंबरा उडविला ॥३७॥ पिसाऱ्याचे प्रबळ बळ । रविचंद्रादि ऋषिमंडळ । दाखविलें धुव्रमंडळ । रणकल्लोळ श्रीराम ॥३८॥ घायेंवीण आली भोंवंडी[2] । तळीं पडली मुरकुंडी । रुधिर[3] वाहे नाकीं तोंडीं । बाणार्धखंडीं दंडिला ॥३९॥ त्रिशिरा सावध होवोनि पाहे । अंग प्रत्यंगी न देखे घाये । म्हणे मजला जालें काये । मिथ्या भय रामाचें ॥४०॥ जाला सर्वांगीं सावध । शस्त्रास्त्रीं सन्नद्ध बद्ध । करावया श्रीरामाचा वध । अति सक्रोध चालिला ॥४१॥ जेंवी पतंग दीपासीं । मागें सरणें नाहीं त्यासी । तेंवी गिळावया श्रीरामासी । अति क्रोधेसी निघाला ॥४२॥ हाक देखोनिया तवकें[4] । पसरोनियां तिन्हीं मुखें । आला श्रीरामासन्मुखें । जेंवी अतंक[5] प्रळयांतीं ॥४३॥ श्रीराम गिळावया एकसरें । काम क्रोध लोभ दरें[6] । मुखें पसरिलीं तदाकारें । अति दुर्धरें समसमितें ॥४४॥ नातरी गिळावया निर्गुण । जेंवी खवळती तिन्ही गुण । तैशीं तिन्हीं मुखें जाण । श्रीरामनिधान गिळावया ॥४५॥ ऐसें देखोनि त्रिशिरा । हासे आलें श्रीरघुवीरा । धनुष्यीं सज्जोनियां शरा । निजनिर्धारा उद्यत ॥४६॥ तीन बाण घेवोनि हातां । त्रिशिरा विंधिलासे माथां । तो म्हणे हे पुष्पाक्षता । बाणीं रघुनाथा बळ नाहीं ॥४७॥ बाण रुतले फुलांऐसे । त्रिशिरा खदखदा हांसे । श्रीरामबाणीं बळचि नसे । अति आवेशें नाचत ॥४८॥ हांसोनि उपडितां बाण । तंव ते अतिशयेंसी कठिण । सरली त्रिशिऱ्याची आंगवण[7] । माथींचे बाण नुपडती ॥४९॥ जंव जंव बाण उपडीत जाये । तंव तंव घायें घुसती पाहें । तरी तें विपरीत जालें आहे । म्हणे म्यां काय करावें ॥५०॥ पहिलें म्हणे फुलाऐसे । त्रिशिरा खदखदां हांसे । श्रीरामबाणां बळचि नसे । अति आवेशें नाचत ॥५१॥ पहिले बाण अहाचगती[8] । आणि उपडूं जातां खडतरती[9] । श्रीरामबाणांची हे ख्याती । जीवघाती श्रीराम ॥५२॥ बाण उपडितां दारुण । भेणें पळाली आंगवण । सपिच्छ बुडाले संपूर्ण । भेदले पूर्ण ब्रह्मांडीं ॥५३॥ लागतां वज्राचा पैं घात । उलथोनि पडे जेंवी पर्वत । तेंवी त्रिशिरा रणांआंत । पाडी रघुनाथ निजबाणीं ॥५४॥ त्रिशिरा पडतांचि भूतळीं । निधा उठिला पाताळीं । बैसलीं दिग्गजांचीं टाळीं[10] । राक्षसदळीं थरकांप ॥५५॥ श्रीराम आला जीवघाती । एकापुढें एक पळती । बाणीं लाविली ख्याती । प्रळयप्राप्ती राक्षसां ॥५६॥ चौदा सहस्र राक्षससैन्य । उरलें शतेक किंचिन्न्यून । श्रीरामाबाणांच्या माराभेण । पलायमान सकंप ॥५७॥

हतशेषास्तथा भग्ना राक्षसाः खरसंश्रयाः । तान्खरो द्रवतो दृष्ट्वा निवार्य च ततः स्वयम् ॥२॥

श्रीरामें राक्षसां केला नाश । सैन्य निर्दाळिलें निःशेष । उरले तिहीं घेतला त्रास[11] । दशदिशा पळताती ॥५८॥ एक सांगती एकासी । कोण निवारी श्रीरामबाणांसी । तरी ठाकोनि जावें खरापाशीं । तो आम्हांसी रक्षील ॥५९॥

**खर राक्षस व श्रीरामांचा रणसंग्राम :** धाकें पळती निशाचर । देखोनि परतलासे खर । सैन्या देऊनि नाभीकर । श्रीरामासमोर तो आला ॥६०॥ श्रीराम देखतांचि दृष्टीं । खरासी कांप सुटला पोटीं । दूषण मारिला जगजेठी । त्रिशिरा हठी निर्दळिला ॥६१॥ एकला पायउतारा

---

शब्दार्थ – १. बोलावी, २. घेरी, भोवळ, ३. रक्त, ४. आवेशाने, ५. यम, ६. गुहा, ७. सामर्थ्य, ८. उगीच, वरवर, ९. घुसती, १०. शब्द, ११. भय.

रघुवीर । धुरा मारिल्या थोर थोर । सेना मारिली चौदा सहस्र । श्रीराम दुर्धर धनुर्वाडा ॥६॥ निधडां[1] होय योद्धा श्रीरघुनाथ । युद्ध करितां अति अदभुत । म्हणोनि खरें पेलिला[2] रथ । धनुष्य हस्तें सज्जोनि ॥६३॥ धीरा वीरा राहें साहें । बळ तुझें मजसी काये । माझें लागलिया घाये । कोण माय राखेल ॥६४॥ अवचटें लागोनियां बाण । मारिला त्रिशिरा आणि दूषण । माझे सन्मुख साहसी बाण । तैं आंगवण[3] मी मानीं ॥६५॥ रणीं समोर जाल्या खर । अंतकासी न धरवे धीर । म्यां मर्दिले सुरासुर । तूं रघुवीर तो किती ॥६६॥ माझें सुटल्या शरसंधान । कोदंड खंडीन सबाण । तुझा घेईन मी प्राण । रणांगण पाहें माझें ॥६७॥ तंव हासोनि म्हणे श्रीरामचंद । खराचा पराक्रम थोर । मी जाणतों समग्र । ऐक साचार महावीरा ॥६८॥ संवदणीं[4] तिमिले[5] रजकहस्तीं । जगाचीं मळें खर वाहती । नातरी कुलाल वाहे माती । हे मुख्य ख्याती खराची ॥६९॥ काळे कोळसे वाहती खाती । कुलालपल्ल्यां[6] लगडा[7] वाहती । जगाचे उकिरडे घोळिती । हे एक ख्याती खराची ॥७०॥ खर पालाणिती वोड[8] । त्यावरी वाहती स्वेच्छा दगड । पाठीं खटीं सोललें बूड । थोर सुरवाड[9] माशांचें ॥७१॥ खरी[10] देखोनियां दुरी । खर भुकें दीर्घस्वरीं । लाथा हाणिती उरावरी । तें सुख भारी खरासी ॥७२॥ मुख्य खराचें भूषण । थोर करी नित्य लोळण । जगाची विष्ठा प्रियभोजन । हें महिमान खराचें ॥७३॥ ऐसी खराची प्रतिष्ठा । प्रिय भोजन जगाची विष्ठा । मरमर दुःशीळा पापिष्ठा । ऋषिवरिष्ठां मारिलें ॥७४॥ त्यांचा घेवोनि सूड कैवाडें[11] । बाणीं फोडिन चांभाडें[12] । तूं पळसील कोणीकडे । बाणांपुढे पैं माझ्या ॥७५॥ खरासी लागतां गोमासी । तडफडित पळे चौंपासीं । माझे बाण लागतां सपिच्छी । तूं पळसी खरु जैसा ॥७६॥ ऐसें ऐकोनि श्रीरामाचें वचन । खर जाला कोपायमान । धनुष्यीं वाहोनियां गुण । अमित बाण वर्षला ॥७७॥ खर वर्षला बहुत बाण । दिशां विदिशां[13] शर संपूर्ण । तें देखोनि क्षोभला रघुनंदन । चाप सज्जोन चालिला ॥७८॥ जेंवी गजावरी केसरी । तेंवी श्रीराम राक्षसांवरी । प्रळयांबुद[14] धारावर्षभारीं । तेंवी शरधारीं वर्षत ॥७९॥ बाण वर्षतां श्रीरघुवीरा । बाणपिसारें सुटला वारा । तेणें चळकांप निशाचरां । बाणीं भेदरा लाविला ॥८०॥ बाणीं रणीं खिळिला वारा । बाणीं खिळिली मुख्य धुरा । रणीं उठिला धुळोरा । बाणें अंबरा व्यापिलें ॥८१॥ खररामबाणीं खणखणाट । घायीं उठिला हव्यावाटे[15] । तेणें बाणपिसारा पेटे । धूम्रांकित खरनेत्र ॥८२॥ बाणीं कोंद भूतळ । बाणीं कोंदलें[16] नभोमंडळ । श्रीरामाचें बाणजाळ । रविमंडळ झांकिलें ॥८३॥ बाणीं कोंदलें आकाश । तिळभरी नाहीं अवकाश । बाणीं राक्षसां लाविला त्रास । कासाविस खर तेणें ॥८४॥ रणीं पडली आंधारी । श्रीरामाच्या प्रभेंकरी[17] । युद्ध कीजे दोघीं वीरीं । महामारीं पेटले ॥८५॥

ततोऽस्य सशरं चापं मुष्टिदेशे महाबलः । खरश्चिच्छेद रामस्य दर्शयन्पाणिलाघवम् ॥३॥

खराने सोडलेल्या वरदबाणांची निष्फळता : खर कोपोनि निर्वाण । सोडिताहे वरद बाण । श्रीराम तुझा झेईन प्राण । हस्तविंदान पाहें माझें ॥८६॥ ऐसें बोलोनि महाहठी । बाणवरदाचिया निजनेटीं । श्रीरामधनुष्य छेदिलें मुष्टीं । पाडिलें सृष्टीं लघुहस्तें ॥८७॥ निजनिर्वाणाचे पूर्ण । सर्वेच घेवोनि सात बाण । श्रीरामहृदय लक्षोन । वेगीं गर्जोन विंधिले ॥८८॥ श्रीरामकवच अभेद्य पूर्ण । अभेद्यकवचीं न रुते बाण । वरदें केलें निजनिर्वाण । सावधान अवधारा ॥८९॥

---

शब्दार्थ - १. धैर्यवान्, २. प्रेरिला, ३. पराक्रम, ४. चर्मकुंडात, ५. भिजलेले, ६. कुंभारांच्या घरांकडे, ७. कावडी, ८. पाथरवट, ९. सुकाळ, १०. गाढवी, ११. कैवाराने, १२. थोबाड, १३. उपदिशांना, १४. प्रळयकाळचा मेघ, १५. अग्नी, १६. तेजाने, प्रभेने, १७. हस्तकौशल्य.

**रामकवचबंधनाचा खराने केलेला छेद :** कवच न भेदे बाणांसी । वरदशक्तीची क्रिया कैसी । छेदोनि बंध बिरड्यासी । कवच भूमीसीं पाडिलें ।।९०।। चाप कवच छेदितां देख । कांपिन्नले तिन्ही लोक । गगनीं देवांसी असुख । परम दुःख इंद्रासी ।।९१।। कवच पडतांचि धरणीं । अभ्रांमधून निघे तरणी[1]। तैसा श्रीराम शोभे रणीं । गिरा गर्जोनी बोलत ।।९२।।

**खराचा मुकुट पाडून त्याला बाणांनी घायाळ :** वरद बाण तुझे समस्त । क्रोधें सांडोनि केले व्यर्थ । तुझा संपला पुरुषार्थ। आंत घात करीन तुझा ।।९३।। मग जो चाप अगस्तिदत्त । सज्जोनियां श्रीरघुनाथ । रणीं चालिला गर्जत । शरसंपात सूटला ।।९४।। खराचे बाण प्रबळ । श्रीरामें निवटिले सकळ । जेंवी गुड[2]पाडी कृषीवल[3] । तेंवी बाणजाळ छेदिलें ।।९५।। हेमपत्री बाण सबीज । सोडोनि खर केला निर्बुज[4] । रथीं छेदोनियां ध्वज । रणीं रघुराज क्षोभला ।।९६।। जैसा स्वर्गभोगच्युत[5]। पुण्यक्षयें होय पतित । तैसा ध्वज लखलखित । पताकायुक्त पाडिला ।।९७।। बाण सोडोनि वरिष्ठ । पाडिला शिरींचा मुकुट । धनुष्य छदिलें उद्धट । रणसंकट खरासी ।।९८।।

तं चतुर्भिः खरः क्रुद्धो रामं गात्रेषु मार्गणैः । विव्याध हृदि मर्मज्ञो मातंगमिव तोयदैः ।।४।।

**खराने सोडलेली शक्तीही श्रीरामांच्या भात्यांत प्रविष्ट झाली :** खरे देखोनि रणसंकट । श्रीराम वधीन मी वरिष्ठ । शक्तिवरदाचे बाणीं श्रेष्ठ । वधावया दुष्ट चालिला ।।९९।। चाप सज्जोनि आकर्ण । शक्तिवरदाचे निर्वाणबाण । घायें घेती परांचें प्राण । अति दारुण अनिवार ।।१००।। तेचि बाण घेवोनि चारी । शक्ति आवाहूनि[6]बीजमंत्रीं । खरें मोकलिले श्रीरामावरी । सतेजधारी धगधगित ।।१।। भूतळीं गजबजले ऋषीश्वर । स्वर्गीं कांपती सुरवर । शक्तिवरद अति दुर्धर । श्रीरामचंद्र केंवी वांचे ।।२।। बाण सुटतां कडाडी । पडली सुरवरांसी झांपडी । दुर्धर तेजाची प्रौढी । ऋषि बापुडीं मूर्च्छित ।।३।। बाण लागतां हृदयावरी । शस्त्रदेवता श्रीरामोदरीं । तिणे बाण धरितां चारी । श्रीरामतूणीरीं[7] रिघाले ।।४।। खर म्हणे झालें विपरीत । वरदशक्ति श्रीरामा भजत । तितें मांडिला आमचा घात । श्रीरघुनाथ नाटोपे ।।५।। श्रीरामाची अगाध थोरी। बाण निवारिले वरद चारी । जयजयकार ऋषीश्वरीं । केला सुरवरीं महानाद ।।६।।

**श्रीरामांनी निर्वाणीचे बाण खरावर सोडले :** बाण निवारिले चारी । श्रीराम कोपलासे भारी । तीन बाण खरावरी । महामारीं मोकलिले ।।६।। श्रीरामबाण देखोनि दृष्टीं । निवारणीं चिंता पोटीं । तंव एकें धनुष्य छेदोनि मुष्टीं । पाडिलें सृष्टी दुखंड ।।८।। ध्वज छेदिला बाणें एकें । आंख[8] छेदी एकें तवकें[9]। दों बाणीं छेदिली दोन्ही चाकें । त्रिवेणु[10] आणिकें छेदिलें ।।९।। चहूं बाणीं चारी वारू । तीन बाणीं छेदिला रहंवरू[11] । एकें बाणें विंधिला खरू । रूधिरोद्गारु प्रवाहे ।।१०।। हत वारू हत सारथी । खर रणीं केला विरथी । मग गदा घेवोनि हातीं । श्रीरामाप्रति धांविन्नला ।।११।। गदा घेवोनियां हातीं । म्हणे घायें मारीन श्रीरघुपती । सरक थरक दावी दीप्ती । गती विगती तळपत ।।१२।।

**खराचा धिक्कार :** हतरथ हतसारथी । नष्टलासी सैन्यसंपत्ती । श्रीराम म्हणतू निर्लज्ज चित्तीं । कासया गदागती दाविसी ।।१३।। तुजपासोनि गेली शक्ती । वृथा वल्गसी गदाहस्ती । गदेसहित पाडीन क्षितीं । तूं पापमूर्ति पापात्मा ।।१४।। ऋषी मारिले श्रेष्ठ श्रेष्ठ । तापस भक्षिले वरिष्ठ । त्याचें फळ भोगिसी स्पष्ट । बाणीं यथेष्ट दंडीन ।।१५।। ब्राह्मण भक्षिले बहुत । ब्रह्महत्येचा दोष अदभुत । बाणधारीं प्रायश्चित । मी निश्चित तुज देईन ।।१६।। दंडकारण्यीं तू

---

शब्दार्थ – १. सूर्य, २. फडेंरें निवडुंग, ३. शेतकरी, ४. घाबरा, ५. स्वर्गातील सुखापासून भ्रष्ट झालेला, ६. स्थापना करून, ७. श्रीरामांच्या भात्यात, ८. रथाचा कणा, ९. आवेशाने, १०. धुरा, ११. रथ.

कंटक । बाणीं छेदीन आवश्यक । वन करीन निष्कंटक । ऋषी निःशंक विचरावया ॥१७॥ निर्नासिक देखतां दृष्टीं । तेथें यशाची कायसी गोष्टी । ससैन्य थूर[1] मरे शेवटीं । भेटल्या नकटी फळ ऐसें ॥१८॥ ते नकटी तुम्हांसांगातें । तुम्हांसी यश कैचें येथें । नकाटियें निर्दळिलें निश्चितें । हे खरातें लक्षेना ॥१९॥ नांवे खर रूपें खर । शस्त्रभार वाहे खर । न कळे बुद्धीचा विचार । ऐसा मूर्ख थोर तूं होसी ॥१२०॥

गदेचा श्रीरामांवर हल्ला, मातंग अस्त्राचा प्रयोग : वर्मभेदी श्रीरामवचन । खर दुर्धर कोपायमान। भूमीस हात पाय घांसोन । गदा घेवोनि धांवला ॥२१॥ किती जल्पसी सैरावैरा । बोलों नको श्रीरामचंद्रा । बहु बडबड न साजे वीरा । रणनिर्धारा[2] पाहें पां ॥२२॥ राहें साहें श्रीरघुवीरा । तुवां मारिल्या बहुत धुरा । तुझ्या घेवोनियां रुधिरा । मारिल्या धुरा तर्पीन[3] ॥२३॥ तुझिया रुधिराचें तर्पणें । तृप्त होतील राक्षसगण । गदाघायें घेईन प्राण । सत्य संपूर्ण पण माझा ॥२४॥ सावध पाहें श्रीरामचंद्रा । एकेंचि घाये करोन पुरा । दांत खातसे करकरां । गदा गरगरां भोवंडी ॥२५॥ धुम्र निघे नेत्रद्वारा । रागें कांपत थरथरां । डसों धांवे श्रीरामचंद्रा । कंठींच्या रुधिरा प्राशावया ॥२६॥ तुझे नळीचें करीन रक्तपान । तेव्हां मी संतृप्त होईन । वटारिले दोनी नयन । श्रीरघुनंदन देखोनी ॥२७॥ निःशेष मारावया रघुवीरा । आव्हानिलें[4] मातंगशस्त्रा। बीजें जपोनि घातकमंत्रा । शस्त्रीं अस्त्रा योजिलें ॥२८॥ ऐसें साधोनि निर्वाण । तेणें उन्मूळत[5] वृक्ष तृण । पृथ्वी होय कंपायमान । मूर्च्छापन्न पशुपक्षी ॥२९॥

सा क्षिप्ता बहुवेगेन प्रदीप्ता महती गदा । भस्म वृक्षांश्च गुल्मांश्च कृत्वागात्तत्वमीपतः ॥५॥

गदा खराची तेजें दारुण । भस्मभूत केले तृण । गुल्म पर्वत कंपायमान । वृक्ष उन्मळोन पडताती ॥१३०॥ गदा उसळतां अंबरा । विमानीं पळणी सुरवरां । चळकांप रविनक्षत्रां। अस्त्रमंत्राचेनि धाकें ॥३१॥

मातंगशास्त्राचे श्रीरामांनी रुद्रमंत्राने केलेले निवारण : अस्त्र दुर्धर देखोन । श्रीराम नित्य सावधान । अघोर रुद्रमंत्र जपोन । बाण दारुण सोडिले ॥३२॥ बाण देखोनि दारुण । अस्त्रमातंगी आली शरण। माझा वांचवावा प्राण । श्रीरामचरण तिये धरिले ॥३३॥ बाण लागतां उद्भट । गदा जाली शतकूट । घायें दुमदुम्लिें वैकुंठ । करोनि पीठ पाडिली ॥३४॥ खर जाला रणोन्मत्त । निर्वाणगदा जाली व्यर्थ । चिंता विसरलें चित्त श्रीरघुनाथ देखोनी ॥३५॥ बाणें गदेचा जाला निःपात[6] । अशेष सैन्या केला घात । शस्त्र सामोग्री करोनि व्यर्थ । श्रीरामभात्यांत बाण आला ॥३६॥ एकला खर उरला रणीं । श्रीरामें जर्जर केला बाणीं । परी खर बाणांतें न गणी । श्रीराम लक्षोनी लोटला ॥३७॥ सगळा राम मी खाय घोंटी । हेंचि धरोनियां पोटीं । धांविन्नला महाहट्टी । निर्वाणदृष्टी लक्षोनी ॥३८॥

रणे प्रहरणस्यार्थे सर्वतो ह्यवलोकयन् । स ददर्श महाशालमविदूरे निशाचरः ॥६॥

स तमुत्पाटयामास संदष्टदशनच्छदम् । राममुद्दिश्य चिक्षेप हतस्त्वमिति चाब्रवीत् ॥७॥

निःशस्त्र होताच खराने वृक्षप्रहार केला, त्याचा बाणाने संहार : श्रीरामें छेदिली शस्त्रसामोग्री । हातेर[7] न दिसे चौफेरीं । विशाल वृक्ष उपडोनि करीं । श्रीरामावरी धांविन्नला ॥३९॥ येणें वृक्षाचेनि घातें । श्रीरामा मारिले जाण म्यां तूंतें । ऐसा गर्जोनि अत्यद्भुतें । वेगीं वृक्षातें सोडिलें ॥१४०॥ वृक्ष देखोनि प्रचंड । श्रीरामें बाण सोडिला वितंड । दुखंड तिखंड नवखंड । करोनि शतखंड पाडिला ॥४१॥ वृक्ष निवटोनि दुर्धर । अंगप्रत्यंगीं खोंचला खर ।

शब्दार्थ - १. मुख्य योद्धा, २. लढण्याचा निश्चय, ३. संतोषवीन, तृप्त करीन, ४. बोलविले, आमंत्रण दिले, ५. मूळासहित उपटून पडू लागले, ६. नाश, ७. शस्त्र.

वाहत रुधिराचे[1] पूर । रणीं रघुवीर क्षोभला ॥४२॥

अंतकशस्त्राचा प्रयोग करून खराचा शिरच्छेद : रणीं निर्दळावया खर । याणीं योजिलें अंतकशस्त्र। प्रळयरुद्र महामंत्र । जपोनि शस्त्र सोडिलें ॥४३॥ देहबुद्धीस मुकला खर । झुंजण्या पळण्या पडे विसर । धरणें मारणें धैर्यनिर्धार । हाही विचार विसरला ॥४४॥ जेवीं कां ज्ञाता नित्यात्मसिद्धी । निश्चयें राहे रामपदीं । तेंवीं श्रीराम देखतां त्रिशुद्धी । रणसमाधी खरासी ॥४५॥ निरसोनि तत्त्वांचा विकार । समाधि पावे मुनीश्वर । तेंवी लक्षितां श्रीरामचंद्र । निर्विकार खर जाला ॥४६॥ येवोनि श्रीरामाचा बाण । माझा घेईल निजप्राण । हेही नाहीं आठवण । श्रीरामा रणसुखकारी ॥४७॥ श्रीरामबाण अति दुर्धर[2]। खराचें उडविलें शिर । रणीं पाडिला महावीर । धन्य रघुवीर खर म्हणे ॥४८॥

खराने केलेले श्रीरामस्तोत्र : देहापासोनी सुटल्या देख । स्तुति वदे खराचें मुख । श्रीरामें छेदोनि द्वंद्वदुःख[3] । दिधलें निजसुख शरघातें ॥४९॥ छेदोनियां जन्ममरणदुःख। छेदोनियां तहान भूक । छेदोनि जीवींची धुकधुक । दिधलें निजसुख शरघातें ॥१५०॥ छेदोनियां ज्ञानाज्ञान । सुखसंपन्न शरघात ॥५१॥ श्रीरामबाणाचा प्रताप । छेदिलें माझें पुण्यपाप । छेदोनियां संकल्पविकल्प । केलें सुखरूप शरघातें ॥५२॥ श्रीरामाचा सतेज बाण । छेदिलें स्थूळ लिंग कारण । छेदोनियां मीतूंपण । सुखसंपन्न शरघातें ॥५३॥ छेदोनि माझा राक्षसविधी । छेदोनि माझी आधिव्याधी । छेदोनि माझी देहबुद्धी । श्रीरामें त्रिशुद्धी सुखी केलें ॥५४॥ श्रीराम रणयोद्धा निकरेंसीं । परी तो सुखरूप घायेंसी । ऐसें वदोनिया स्तुतीसी । पायांपासी शिर आलें ॥५५॥

खराला उत्तम गतीची प्राप्ती : जे गति नव्हे तापसांसी । जे गति नव्हे योगिसंन्याशांसी । ते गती दीधली खरासी । घायासरसीं श्रीरामें ॥५६॥ जे गति न लभे योगयोगीं । जे गति न लभे सर्वत्यागीं । ते गति दिधली खरालागीं । रणरंगीं श्रीरामें ॥५७॥ जे गति न लभे वेदविधी । जे गति न लभे शास्त्रसिद्धी । ते गति दीधली बाणवेधीं । घायें त्रिशुद्धी खरासी ॥५८॥ जे गति न लभे कर्म करितां । जे गति न लभे ध्यान धरितां । ते गति आली खराच्या हाता । बाणाग्रता श्रीरामें ॥५९॥ जो जो श्रीरामदृष्टीं रणीं पडे । तो तो सायुज्यासी चढे । राक्षसांचे भाग्य चोखडें । रणीं रोकडें सायुज्य ॥१६०॥

खराचे शौर्याची प्रशंसा : सुरनरां खर दुर्धर । खरासी शंके दशशिर । तो श्रीरामें रणीं हाणिला खर । जयजयकार द्विजदेवां ॥६१॥

युद्ध पाहून चकित झालेल्या सुरनरांना आनंद व श्रीरामांची स्तुती : युद्ध पहावया सुरवरीं । गगनीं विमानांच्या हारी । वर्षती सुमनांच्या संभारीं । जयजयकारीं गर्जती ॥६२॥ युद्ध पाहों आला ब्रह्मदेव । युद्ध पाहों आला सदाशिव । जयजयकार करिती सर्व। रणीं श्रीराघव निजविजयी ॥६३॥ गगनीं वाजे सिद्धांची टाळी । जयजयकार ऋषींचा भूतळीं । श्रीरामें मर्दिलें राक्षस बळी । भूमंडळीं आल्हाद ॥६४॥ श्रीरामप्रतापाचें पूर्ण । स्वर्गीं लागलें निशाण । हरिखे नाचती सुरगण । श्रीराम रावण निर्दाळील ॥६५॥

लक्ष्मण-सीतेचे अभिवादन : श्रीरामाचें युद्ध देखोन । श्रीरामसेज उतरून । सीतासौमित्र येवोन । लोटांगणें श्रीरामा ॥६६॥ हरिखाचें उल्हासता । सीता आलिंगीं श्रीरघुनाथा । श्रीरामें आश्वासोनि सीता । होय आलिंगिता सौमित्रा ॥६७॥

---

शब्दार्थ - १. रक्ताचे, २. कठिण, तीक्ष्ण, ३. सुखदुःख, पापपुण्यादि अवस्थाद्वय.

श्रीरामांचा ऋषींना नमस्कार, आशीर्वादमहिमा : पाचारोनि ऋषिगण । श्रीराम घाली लोटांगण । राक्षसीं गांजिले ब्राह्मण । तें मी उत्तीर्ण पैं जालों ॥१६८॥ राक्षयभयातें निवारीं । ते म्यां आज्ञा वंदोनि शिरीं । तुमचिये कृपेकरीं[१] । केली बोहरी[२] राक्षसां ॥१६९॥ तुमचिया कृपायुक्ती । मज जाली यश:प्राप्ती । राक्षस मारिले जाली कीर्ती । सत्संगतिनिजबळें ॥१७०॥ जयाचे पाठीसीं द्विजवर । देवोनि असती नाभीकार । एकला जिंके तो चराचर कृपा सधर द्विजांची ॥७१॥

समस्तसंतत्समवाप्तिहेतवः समुत्थितापत्कुलधूमकेतवः ।
अपारसंसारसमुद्रसेतवः पुनन्तु मां ब्राह्मणपादपांसवः ॥८॥

सद्‌गुण संपत्तीचें कारण । ब्राह्मणांचा चरणरेणुप्रमाण । परमापत्तिकुळनिर्दळण[३] । द्विजचरणप्रसादें ॥७२॥ अपार भवसागराआतुं[४] । द्विजपदरजसन्नद्ध[५] सेतु । पडणें बुडणें नाहीं आवर्तु[६] । सुखस्वार्थु द्विजचरणीं ॥७३॥ ब्राह्मणांचे चरणतीर्थी । गंगादि तीर्थें पवित्र होती । दास्य करिती चाऱ्ही मुक्ती । सभाग्य भजती द्विजचरणीं ॥७४॥ त्या तुमची नित्ससंगती । भाग्यें मज जाली प्राप्ती । तेणें पावलों अगाध कीर्ती । वानूं किती द्विजमहिमा ॥७५॥ तुम्हांसी कांही द्यावें दान । ब्रह्मार्पण जन्मस्थान । करोनि स्वधर्मानुष्ठान । सुखसंपन्न असावें ॥७६॥ अरुणा वारुणा सरस्वती । ब्रह्मगिरी अष्टतीर्थी । करितां शंको नका चित्तीं । आज्ञानुवर्ती मी तुमचा ॥७७॥ ऐसें बोलोनि श्रीरघुनंदन । पुढती घाली लोटांगण । सुखी जाहले ब्राह्मण । श्रीरामगुण वर्णिती ॥७८॥

ब्राह्मण-ऋषींकडून श्रीरामांचे अभिनंदन : वानिती[७] श्रीरामाची कीर्ती । वंदिती श्रीरामाची मूर्ती । श्रीरामगुण गीतीं गाती । द्विज गर्जती श्रीरामनामें ॥७९॥ द्विजीं घेतलें जनस्थान । राक्षसपत्न्या पलायमान । हिरोनि घेतलें धनधान्य । वस्त्रभूषण ते हरिती ॥१८०॥ गंगातीरींचें ब्राह्मण । अतिशयेंसीं महाकठिण । आम्हांसी नागविती संपूर्ण । त्यांसी कोण निवारी ॥८१॥ पुरुषांची जातिव्यक्ती । श्रीरामें रणीं लाविली ख्याती । आम्हीं रांडातें द्विज नागविती । धाकें मुततीं सांगती शूर्पणखे ॥८२॥ राक्षसपत्न्या पैं विमानीं । त्यांमाजी नकटी मुखरणी[८] । भेडसावितां ब्राह्मणीं । जीव घेवोनि पळाल्या ॥८३॥ ऋषी राहिले जनस्थानी । श्रीराम राहिला स्वस्थानीं । एका शरण जनार्दनीं । रामायणीं सुखस्वादु ॥८४॥ रामायणीं भुक्ति मुक्ती । रामायणीं अगाध कीर्ती । रामायणीं ब्रह्मप्राप्ती । असे निष्ठत श्रवणार्थे ॥८५॥ एकाजनार्दना शरण । जीवां रमणीय रामायण । खरादिराक्षसमर्दन । श्रीरघुनंदन निजविजयी ॥८६॥ इति श्रीभावार्थरामायणेऽरण्यकांडे एकाकारटीकायां खरमर्दनं नाम एकादशोऽध्याय: ॥११॥ ओंव्या ॥१८६॥ श्लोक ॥८॥ ॥१३४॥

## अध्याय बारावा

### शूर्पणखा-रावण संवाद

पंचवटीतील राक्षससंहारामुळे राक्षसस्त्रियांचा विलाप : श्रीरामचंद्राय नमः ॥ खरत्रिशिरादि बळांवर्ती[९] । राक्षसांची जातिव्यक्ती[१०] । रामें रणीं पाडिले क्षितीं । शरसंपातीं निवटोनियां ॥१॥

ततः शूर्पणखा दृष्ट्वा सहस्राणि चतुर्दश । हतानि रामेणैकेन मानुषेण पदातिना ॥१॥

---

शब्दार्थ – १. कृपेकरून, कृपेने, २. नाश, ३. सर्व दुःखांचा नाश, ४. संसारसमुद्रात, ५. बळकट, ६. भोवरा (पुनरावृत्ती), ७. वर्णन करितात, ८. मुख्य, ९. सैन्यसमूहासह, १०. जातिमात्र

एकला श्रीराम धनुष्यपाणी । युद्धीं विचरतां चरणीं । चवदा सहस्त्र वीरश्रेणीं[1] । पाडिले रणीं शरघातें ॥२॥ बोंब सांगावया पुरती । राक्षसांची पुरुषव्यक्ती । नाहीं उरली रणाप्रती । बाणावर्तीं निवर्तले ॥३॥ बोंब सांगावया देख । उरली शूर्पणखा एक । घेवोनि लक्ष्मणाचा धाक । मारोनि हाक पळाली ॥४॥ रणीं विमर्दाची[2] धुकधुक । अति आक्रोशें करी शंख। जनस्थाना आली देख । नकटें मुख घेवोनी ॥५॥ खरादिकांच्या पत्नी । हांसती शूर्पणखेतें देखोनी । वोहिनीस गौरवीत रणीं । नाकीं सुपाणीं[3] बाणलें ॥६॥

समस्त राक्षसींचा शूर्पणखेला शाप : दोघें माणसें तीं किती । खरादिक मारोनि येती । हा निश्चयो स्त्रियांचे चित्तीं । तेणें हांसती शूर्पणखे ॥७॥ फें फें करीत सांगे मात । रणीं क्षोभोनि रघुनाथ । सोडोनि बाणांचा आवर्त । केला निःपात राक्षसां ॥८॥ त्रिशिरा खर दूषण । चवदा सहस्र राक्षसगण । श्रीरामें मारोनी आपण । दिधलें जनस्थान द्विजांसी ॥९॥ ऐसी ऐकतांचि गोष्टी । जनस्थानीं बोंब उठी । वीर निर्दाळोनि जगजेठी । निर्लज्ज नकटी कां आली ॥१०॥ करितां नकटीचा कैवार । त्रिशिरादूषणादिखर । चवदा सहस्र निशाचर । सहपरिवार मारिले ॥११॥ नकटें भेटलिया ख्याती । पुरुषांच्या जातिव्यक्ती । इयें गिळिले अपशकुनार्थीं । आम्हाभोवतीं रडों आली ॥१२॥ बोंब उठिली घरोघरीं । दीर्घ स्वरें रडती नारी । कोण कोणातें निवारी । समभरीं[4] समदुःखी ॥१३॥

जनस्थान ब्राह्मणांना आंदण दिले : आम्ही रडों घरोघरीं । राखता नाहीं कोणी कैवारी । द्विज निघोनि घरोघरीं । क्षणामाझारी नागविती ॥१४॥ राक्षसीं भक्षिलें द्विजांसी । हाडद्वंद्व[5] ब्राह्मणांसीं । तें येवोनि अति आवेशीं । सर्वस्वेंसीं नागविती ॥१५॥ ब्राह्मणांचें दादुलेपण । माहेविणयांभोवतें[6] पूर्ण । त्यांसी दिधलें जनस्थान । आली नागवण रांडांसी ॥१६॥ ब्राह्मणांचा ब्रह्मदंड । रांडादंडणीं अति प्रचंड । शूर्पणखेचें काळें तोंड । केली रांड अवघियांची ॥१७॥ ऐसिया रडती पडती । एकी कान केश तोडिती । एकी अत्यंत हडबडती । एकी आरडती आक्रोशें ॥१८॥

शूर्पणखेच्या सांगण्यावरून सर्वांचे लंकेस प्रयाण : शूर्पणखा बोले पुढती । तुम्ही येथें रडाल किती । लागवेगें ब्राह्मण येती । ते नागविती समस्तां ॥१९॥ पडलिया ब्राह्मणांचे बंदीं । सुटका नाहीं कल्पांतसंधीं । मग कांही न चले बुद्धी । निघावें त्रिशुद्धी[7] लंकेसी ॥२०॥ येथे मारविले महाबळी । निघाली करावया लंकेची होळी । नकटी लागली राक्षसमूळीं। रावण सकुळीं[8] निर्दाळावया ॥२१॥ द्विजां दिधलें जनस्थान । शिष्यसह धांवले ब्राह्मण । राक्षसी गजबजिल्या पूर्ण । पलायमान समुदायें ॥२२॥ द्विज धांवले पूर्वद्वंद्वार्थी । विमान हिरोनि सहसंपत्ती । तेणें राक्षसी बहुत भीती। मग येती काकुळती शूर्पणखे॥२३॥ ब्राह्मण येती दाटोदाटी । विक्राळरूपें धांवे नकटी । तुम्हीं अवघियांतें मी घोटीं । म्हणोनि पाठीं लागली ॥२४॥

ब्राह्मणांची धांदल : ब्राह्मण पळती उपराउपरी[9] । शंख करीं दोहीं करीं । एक मुतती धोत्रांतरीं । एकां बोहरीं[10] होंसरली ॥२५॥ एकापुढे एक पळे बळी । पळतां बैसली दांतखिळी । नागवे आले श्रीरामाजवळी । धोत्रें फिटलीं शुद्धि नाहीं ॥२६॥ मागें राहिलियापाठीं । शूर्पणखा गिळील नकटी । शंख करिती तये संकटी । धांव जगजेठी श्रीरामा ॥२७॥ धाप न समाये पोटीं । मार्ग लक्षेना भयें दृष्टीं । ब्राह्मण अतिशय संकटीं । पंचवटीं पावलें ॥२८॥ श्रीरामा धांव पाव झडकरी । शूर्पणखेनें गांजिलें भारी । गिळिलों गिळिलों निशाचरी । भय निवारीं श्रीरामा ॥२९॥

---

शब्दार्थ - १. वीरांच्या पंक्ती, २. नाशाची, ३. नथ, ४. सारख्या भाराने, ५. हाडवैर, ६. रजस्वला स्त्रियांजवळ, ७. खरोखर, ८. कुळासकट, ९. वारंवार, १०. नाश.

श्रीराम लक्ष्मणाला शोध करण्यास सांगतात : निर्भय दे गा ब्राह्मणां । दान दिधलें जनस्थाना । रामराज्या आले विघ्ना । गोब्राह्मणां गांजिलें ।।३०।। श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । म्यां निर्दळिलें राक्षसांसी । कोणे भेडसाविलें ब्राह्मणांसी । त्या भयासी निवारीं ।।३१।।

शूर्पणखेने केलेला प्रलय : पहिले ब्राह्मण पळवू गेली । लोभें शूर्पणखे आली भुली । ब्राह्मणांचें मांस खाऊं धांवली । तीतें देखिली लक्ष्मणें ।।३२।। निजसानिका विटंबिली । राक्षसांची समाप्ति जाली । शूर्पणखा तें विसरली । भक्षूं आली द्विजमांस ।।३३।। जेंवीं कां मत्स्य आमिषा[1] गिळी । गळ ओढिलिया तो तळमळी । याहूनि शूर्पणखेसी भुली । भक्षूं आली द्विजमास ।।३४।। बाप विषयांचे आवडीं । नाठवती दुःखकोडी । विसरोनि मरणओढी । विषयगोडी वाढविती ।।३५।।

लक्ष्मणाने तिचे कान कापले : तैसी शूर्पणखा जाण । भक्षूं धांवे ब्राह्मण । लक्ष्मणें सोडोनियां बाण । दोनी कान छेदिले ।।३६।। करूं नये स्त्रियेचें हनन । ते पाळिलें श्रीरामवचन । तिचे छेदितां दोनी कान । पलायमान शूर्पणखा ।।३७।।

राक्षसस्त्रियांसह तिचे लंकेला विमानाने प्रयाण : राक्षसपत्न्या सवें घेवोनी । शूर्पणखा बैसे विमानीं । लंकाभुवन अनुलक्षोनी । जीव घेवोनी पळाली ।।३८।। शूर्पणखा मुख्य विमानीं । माशा घोंगाती नाकीं कानीं । सगें स्त्रियांची शंखध्वनी । आक्रंदोनी जल्पती । ।।३९।।

स्त्रियांकडून शूर्पणखेचा धिक्कार : येथें मारविल्या राक्षसथाटी । पुढें मारवील कोट्य-नुकोटी । नकटी परतली उफराटी । रावणा संकटीं घालावया ।।४०।। पहिली ख्याती नकटीची। नळी[2] निमटिली खरादिकांची । आतां नकटी जाली बुच्ची[3] । उरी[4] रावणाची केंवी उरे ।।४१।। ?णेंचि वाढविली कळी । चवदा सहस्त्रां केली होळी । नकटी लागली राक्षसमूळीं । रावण ?कुळीं निर्दाळावया ।।४२।। दुःख न समाये पोटीं । रागें बोलती विरोधगोष्टी । रडतां जालिया हेंपुटी[5] । तंव लंका दृष्टीं देखिली ।।४३।।

जगाम परमोद्विग्ना लंकां रावणपालिताम् । सा ददर्श विमानाग्रे रावणं दीप्ततेजम् ।।२।।
उपोपविष्टं सचिवैर्मरुद्भिरिव वासवम् । आसीनं सूर्यसंकाशे कांचने परमासने ।।३।।

तिचा उद्वेग, लंकेस आगमन व रावणाची भेट : लक्षोनियां लंकाभुवन । शीघ्रगतीं आलें विमान । ?ूर्पणखा आली उद्विग्नमन[6] । विरुद्धवचन स्त्रीवाक्यें ।।४४।। रावण देखिला लंकाभुवनीं । जैसा ?द्र मरुद्गणीं । तैसा परिवारित[7] प्रधानीं । सिंहासनीं शोभत ।।४५।। ऐसा रावण देखतां दृष्टीं। ?मानीं एकचि बोंब उठी । रावणें विमान देखतां दृष्टीं । देखिली नकटी शूर्पणखा ।।४६।।

तिचा रावणापुढे आक्रोश; तिचे विडंबन पाहून सर्वांस आश्चर्य : शूर्पणखा स्वयें आपण । दीर्घस्वरें ?री रुदन । रावणाचे धरोनि चरण । मूर्च्छापन्न अति दुःखें ।।४७।। ऐसा कोण महाबळी । ?ासिका छेदोनि समूळीं । उघडी पाडिली दातांवळी । केली कर्णमूळीं बुचाट[8] ।।४८।। ?ूर्पणखेचें विटंबन । देखोनि गजबजिला रावण । प्रधासनसेना कंपायमान । चकित जन ?ंकेचे ।।४९।। रावणाचे निजदळीं । शूर्पणखा महाबळीं । तेहीं विटंबिली समूळीं । ऐसा ?ार्तुबळी तो कोण ।।५०।।

तिच्याकडून वृत्तांतकथन, रामाचे वर्णन व त्याने केलेला संहार : तूं ज्येष्ठ असतां रावण । मज ?ूर्पणखे विटंबन । त्रिशिरा मारिला खर दूषण । रण कंदनें श्रीरामें ।।५१।। चवदा सहस्र वीर

---

शब्दार्थ – १. गळाला लाविलेल्या मांसाला, २. गळे, ३. नाक व कान यांविरहित, ४. बाकी, शिल्लक, ५. कष्टी, ६. कासावीस झालेली, ७. वेष्टिलेला, ८. कान कापलेली.

अनिवर्ती[1]। रामें मारिले बाणावर्ती[2]। राक्षसांची जातिव्यक्ती । रणसमाप्ती श्रीरामें ॥५२॥ रणीं राक्षसां रणसमाप्ती । वार्ता सांगावया पुरती । मी एक उरलें प्रमदाजाती । रामें शास्त्रोक्तीं[3] सोडिलें ॥५३॥ श्रीरामशास्त्रार्थी सर्वज्ञ । करूं नये स्त्रियेचें हनन[4]। म्यां छळितां रामलक्ष्मण । तेणें नाक कान छेदिले ॥५४॥ करितां पुढिल्यासी[5] छळण । छळणें छळें स्वयें आपण । तें मज जालें प्रमाण । विटंबन मुख्य मुखा ॥५५॥ छळें छळिलें मी कैसी । मुख दाखवूं नये कोणासी । श्रीरामाची ख्याती ऐसी । राक्षसांसी अंतक[6] ॥५६॥ माझें घेयोनि नाक कान । द्विजा दिधलें जनस्थान । ब्राह्मणीं विमान घेतां हिरोन । मी पळोन येथे आलें ॥५७॥ श्रीराम निर्लोभी संपूर्ण । घेवोनियां जनस्थान । स्वयें द्विजांसी दिधलें वरदान । श्रीराममहिमान अगाध ॥५८॥

तिने रावणाला दिलेला धोक्याचा इशारा : प्रतापतेजें श्रीरघुनंदन । तुझें घेवोनि लंकाभुवन । तेंही सर्वेचि देईल दान । ऐसें चिन्ह दिसताहे ॥५९॥ तुझ्या राज्या आलें विघ्न । गर्वे नेणसी तूं अज्ञान । माझें ऐकोनि वचन । सावधान हो वेगीं ॥६०॥

ततः शूर्पणखां दृष्ट्वा वदंतीं परुषं वचः । अमात्यमध्ये संक्रुद्ध : परिपप्रच्छ रावणः ॥४॥
कश्च रामः कथंवीर्यः किंरूपः किंपराक्रमः । किमर्थं दंडकारण्यं प्रविष्टश्च सुदुस्तरम् ॥५॥

त्यामुळे रावण अस्वस्थ : ऐकतां शूर्पणखेची गोष्टी । स्वयंवरीं देखिला श्रीराम दृष्टीं । तो राम आठवितां पोटीं । थरकांप उठी रावणासी ॥६१॥ धनुष्यें घोळसिलें[7] मातें । तें भंगिलें श्रीरघुनाथें । तैं त्यासी बाळपण होतें । आतां पुरतें तारुण्य बाणलें ॥६२॥ याचा तारुण्यबाणप्रताप । सहावया चवदा सहस्त्र अल्प । त्रिशिरा खर दूषण स्वल्प । महाकंप रावणा ॥६३॥ वार्ता वदतांचि नकटी । रावणें धाक घेतला पोटीं । बाह्य लौकिकाचारदृष्टीं[8]। गर्जत उठी अति क्रोधें ॥६४॥

वरपांगी धैर्याचा देखावा करून रामांची माहिती विचारतो : माझी भगिनी प्रिय पूर्ण । दंडोनि केलें विटंबन । श्रीराम कोठिला कोणाचा कोण । समूळ लक्षण सांग त्याचें ॥६५॥ कोण वीर्य कैसी शक्ती । किती सैन्य कोण सारथी । दंडकारण्यीं कां केली वस्ती । आयुधें किती श्रीरामा ॥६६॥ त्रिशिरा आणि खर दूषण । मारावया काय कारण । तुझें कां केलें विटंबन । समूळ कथन मज सांगें ॥६७॥

इत्युक्ता राक्षसेंद्रेण राक्षसी क्रोधमूर्च्छिता । रामें तस्मै यथातत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ॥६॥
दीर्घबाहुर्विशालाक्षश्चीरकृष्णाजिनाम्बर : । कंदर्पसमरूपश्च रामो दशरथातमजः ॥७॥
शक्रचापनिभं चापं विकृष्य कनकांगदम् । दीप्तान्क्षिपति नाराचान्सर्पानिव महाविषान् ॥८॥
आददानं शरान्घोरान्विमुंचतं महाबलम् । रक्षसां भीमवीर्याणां सहस्राणि चतुर्दश ॥९॥
निहतानि शरैस्तीक्ष्णैस्तेनैकेन पदातिना । अर्धाधिकमुहूर्तेन खरश्च सहदूषणः ॥१०॥

रावण जो कां लंकानाथ । तेणें पुसिला श्रीरघुनाथ । त्याचें स्वरूप इत्यंभूत । असें सांगत शूर्पणाखा ॥६८॥

शूर्पणखेने केलेले रामाचे वर्णन : शूर्पणखा व्यथामृत । विटंबिली क्रोधयुक्त । श्रीरामाचें निजवृत्त । असे सांगत यथान्वयें ॥६९॥ श्रीराम श्याम अति सुंदर । रमारमणीय मनोहर । सुस्वरूप सुखसार । ब्रह्म साकार श्रीराम ॥७०॥ कमलनयन कमलपत्र । सुखैकघन श्रीरामवक्त्र । मुख

---

शब्दार्थ – १. मागे न हटणारे, पुरुषार्थी, २. बाणसमूहांनी, ३. स्त्रियांची हत्या करू नये, ४. असे धर्मशास्त्रात सांगितल्यामुळे. ५. दुसऱ्याला, ६. शेवट करणारा, ७. पाडिले, ८. लोकांना आपण शूर आहोत हे दाखविण्यासाठी.

देखिल्या निवती नेत्र । सुखशृंगार श्रीराम ॥७१॥ जटा मुकुट मनोहर । चीरकृष्णजिनांबर[1] । आजानुबाहु धनुर्धर । बाणतूणीर अक्षय्य ॥७२॥ कर्पूरयुक्त पिंवळा टिळा । कर्णीं कुंडलें कमळमाळा । कांसे मिरवे सोनसळा । वीर मंगळ श्रीराम ॥७३॥ ध्वजवज्रांकुशरेखा । दोहीं पायीं पद्में देखा । पाउलें सुकुमार रघुकुळटिळका । अति नेटका[2] पदांबुजें ॥७४॥ सावळे अंगीं शुभ्र उटी । ते देखतां न पुरे दृष्टी । मना नयनां आनंदकोटी । वीर जगजेठी श्रीराम ॥७५॥ अंगीं खुपती चंद्रकर । ऐसा श्रीराम अति सुकुमार । रणरंगी रणरंगधीर । परशूराम श्रीराम ॥७६॥ शक्रचापासम चाप । सुवर्णभूषणीं भासें सद्रूप । श्रीरामाचा निजप्रताप । सत्यसंकल्प श्रीराम ॥७७॥ पाहतां श्रीरामाचें रूप । कोटी कंदर्पां[3] हरे दर्प । लावण्याचा परम दीप । सुखस्वरूप श्रीराम ॥७८॥ केव्हां ओढी केव्हां जोडी । केव्हां बाण सवेग सोडी । मारिल्या राक्षसांच्या कोडी । रणनिर्वडी[4] श्रीराम ॥७९॥ श्रीरामासी नाहीं रथ सारथी । नाहीं सैन्य साह्यसंपत्ती[5] । श्रीराम एकला एक पदाती । राक्षसघाती अंतक ॥८०॥ त्रिशिरा खर दूषण शूर । अनुवर्ती चवदा सहस्त्र । श्रीराम न घेतां दुसरें शस्त्र । केला संहार बाणाग्रें ॥८१॥ पुरुषाची जातिव्यक्ती[6] । रणीं श्रीरामें केली समाप्ती । बोंब सांगावया पुरती । तुम्हांप्रती मी आलें ॥८२॥ जैसा सांगितला श्रीरामचंद्र । तैसाचि सखा सौमित्र । तोही रणरंगधीर । परमशूर अति योद्धा ॥८३॥ समान बळ समान शीळ । दोघे समानरूपें निर्मळ । दोघे सर्वार्थीं अति कुशळ । दोघे प्रबळ रणमारा ॥८४॥ प्रतिपाळावया पितृवचन । दोघीं सेविलें दंडकारण्य । सवें सीता सती जाण । बळवाहन[7] पैं दोघे ॥८५॥ लक्ष्मण श्रीरामाचा भक्त । अनन्यभावें अनुरक्त । सेवेलागोनि नित्य रत । सावचित्त सर्वस्वें ॥८६॥ विटंबोनि मजकारणें । तुमचें उठविलें ठाणें । तुम्ही काय जितां जिणें । करा धांवणें ससैन्य ॥८७॥ धांवणें करूं जाता खर । मारिलें चवदा सहस्त्र वीर । तैसी येथें मी नव्हे पामर । श्रीरामचंद्र नाटोपे ॥८८॥

ते ऐकून रावणाची प्रतिक्रिया : ऐसें विचारोनि रावणें । नाहीं केलें धांवणें । शूर्पणखेचें गाऱ्हाणें । जीवें प्राणें उपेक्षिलें ॥८९॥ देखोनि रावणाचें चिन्ह । शूर्पणखा अति उद्विग्न । प्रलोभावया त्याचें मन । काममोहन प्रतिपादी ॥९०॥

> रामस्य तुं विशालाक्षी धर्मपत्नी यशस्विनी । सीता नाम वरारोहा पूर्णेंदुसदृशानना ॥११॥
> नैव देवी न गंधर्वी न यक्षी नैव किंनरी । तथारूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले ॥१२॥
> या सुशीला वपुःश्लाघ्या रूपेणाप्रतिमा भुवि । तवानुरूपा भार्या सा त्वं च तस्याः पतिर्वरः ॥१३॥

शूर्पणखेने हेतुपूर्वक केलेले सीतेचे रूपवर्णन : श्रीरामापासीं सीता सुंदरी । तैसी नाहीं दुसरी नारी । मज पाहतां या चराचरीं । तिची सरी न पवती ॥९१॥ रमा उमा न पवे[8] सरी । तेथें कोण पुसे सावित्री । देवी गंधर्वी ना असुरी । तिच्या घवकारीं[9] खद्योत ॥९२॥ पद्मिनी स्त्रिया मृदुशरीर । त्यांहूनी तिचीं नखें अरुवार[10] । ऐसी सुंदर सुकुमार । मनोहर जानकी ॥९३॥ ठाणमाण गुणलक्षण । घवघवित निजलावण्य । तिचें देखतांचि वदन । मूर्च्छापन्न कंदर्प ॥९४॥ वर्तुळ वदन विशाळ नयन । देखतां जाय भूक तहान । तिचें देखतां बरवेपण । मनमोहन विरक्तां ॥९५॥ सीता देखतां सौभाग्ययुक्त । फिकें होय पंचामृत । तीपासोनि न उठे चित्त । लोलंगत तत्कामें ॥९६॥ तिचें देखता श्रीमुख । दशेंद्रियां होय हरिख । मनाची खुंटे चकमक । लगे टकमक डोळिया ॥९७॥ श्रीराम वनवासी । वीतराग[11] योगी । सीता न शोभे त्याचे अंगीं । ते तंव भार्या तुजजोगी । तीसीं तूं भोगीं लंकानाथा ॥९८॥ तें तुवां

शब्दार्थ – १. वल्कले व हरिणाचे कातडे, ही ज्याची वस्त्रे आहेत असा, २. सुरेख, ३. मदनांचा, ४. युद्धकुशल, ५. पाठीराखे, ६. पुरुषमात्र, ७. शक्तिमान, ८. बरोबर, ९. तेजामध्ये, १०. नाजूक, ११. विरक्त.

देखिलियापाठीं[1] । सत्य मानिसी माझी गोष्टी । ते पडावी तुझ्या दृष्टी । हें माझ्या पोटीं वर्तत ॥९९॥ बुद्धिपूर्वक आपण । सीता पहावी अनर्घ्य रत्न । तेव्हां मानिसी माझें वचन । साक्षेपें प्रयत्न करशील ॥१००॥ सीता सांगतां शूर्पणखेसीं । स्वयंवरीं देखिली होती जैसी । चांफेगोरटी लावण्यराशी । तैसी मानसीं ठसावली ॥१॥

ततः शूर्पणखावाक्यं श्रुत्वा तद्रोमहर्षणम् । सचिवानभ्यनुज्ञाय जगाम स्वं निवेशनम् ॥१४॥
मत्कायार्थं विदित्वा च यथावदुपलभ्य च । दोषाणां च गुणानां च संप्रधार्य बलाबलम् ॥१५॥
इति कर्तव्यमित्येव कृत्वा निश्चयमात्मनः । स्थिरबुद्धिस्ततो रम्यां यानशालां जगाम ह ॥१६॥

रावणाची अवस्था : ऐकतां शूर्पणखेचें वचन । आणि होतां सीतेची आठवण । शरीरीं रोमांचित रावण । लागलें ध्यान सीतेचें ॥२॥ करितां गमनागमन[2] । सीतामय त्याचें मन । करितां भोजन शयन । अखंड ध्यान सीतचें ॥३॥ रावण निजल्या शेजेवरी । स्वप्नीं देखे सीता सुंदरी । तिची अवस्था लागली थोरी । कैसिया परी आतुडे[3] ॥४॥ श्रीराम प्रतापी परिपूर्ण । त्यासीं न करवे मज रण । तरी त्यासी करोनियां छळण[4] । सीता आपण आणावी ॥५॥ छळोनियां रघुनंदना । त्यासी आणावी अंगना । कळूं देऊं नये जनां । गोष्टी प्रधाना सांगूं नये ॥६॥ मग विसर्जोनियां[5] सभास्थाना । रावण आला निजभुवना । सीताप्राप्तीची विवंचना । निजमना विवंची[6] ॥७॥

भावी कार्याची दिशा निश्चित करून मारीचाकडे प्रयाण : निद्रा न लागे शेजेआंत । आता सारथि पाचारूं त्वरित । पिशाचखरीं योजिला रथ । निघे लंकानाथ मारीचापासीं ॥८॥ मारीचरावणां भेटी गोष्टी । मायामृगाची कामिकदृष्टी । दोघे येती पंचवटीं । सीतागोरटीहरणार्थ ॥९॥ लागतां श्रीरामाचा बाण । मारीच पावेल मरण । मरतामरता करील छळण । धांव लक्ष्मणा गर्जोनी ॥११०॥ मोडोनि धनुष्येंसीं रथा । जटायु जिणोनि लंकानाथा । त्यापासोनि सोडवील सीता । अपूर्व कथा अवधारा ॥११॥ एकाजनार्दना शरण । पुढें अपूर्व निरुपण । कथाकल्पषविध्वंसन[7] । सावधान अवधारा ॥१२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां शूर्पणखारावणसंवादो नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥ ओंव्या ॥११२॥ श्लोक ॥१६॥ एवं ॥१२८॥

## अध्याय तेरावा

### रावण व मारीच यांचे पंचवटीत आगमन

रावण व मारीच यांची भेट : श्रीरामचंद्राय नमः ॥ सीताप्राप्त्यर्थ उद्विग्न । रथारूढ रावण । मारीचाश्रमा ठाकोन । आला आपण सवेग ॥१॥

तत्र कृष्णानिजधरं जटामंडलधारिणम् । ददर्श नियताहारं मारीचं नाम राक्षसम् ॥१॥
तं रावणः समागम्य विधिवत्स्वेन तेजसा । कुशलं परिपृच्छ्यार्थ ययाचे तेज पूजितः ॥२॥

मारीचातें देख रावण । जटाधारी वल्कलाजिन । आणि नेमस्थ फळभोजन । एकांतस्थान वनवासी ॥२॥ ऐसा मारीच रावणें देखोन । दोघीं दिधलें आलिंगन । मग त्यासी कुशळ पुसोन । केलें पूजन यथाविधि ॥३॥

आलेल्या संकटांचे मारीचाला निवेदन व सीता हरणाची इच्छा : मग बैसवून एकांतीं । रावण सांगे मारीचाप्रती । रामें गांजिलें बहुतां रीतीं । सांगूं किती तुजपायीं ॥४॥ पद्मपुराणीं माझें ठाणांतर[8] ।

---

शब्दार्थ – १. पाहिल्यावर, २. जाता येता, ३. प्राप्त होईल, ४. कपट, ५. उरकून, ६. विचार करू लागला, ७. पापाचा नाश करणारी, ८. दुसरे स्थान.

दूषण त्रिशिरा आणि खर । चवदा सहस्र निशाचर । अति दुर्धर[1] तिहीं लोकीं ॥५॥ श्रीरामें वर्षोनि शर । मारिला खर दूषण त्रिशिर । चवदा सहस्र निशाचर । बाणधारा निवटिले[2] ॥६॥ आणि शूर्पणखा भगिनी धाकुटी । सकर्णनासिकें ते केली नकटी । लाजविल्या राक्षसकोटी[3] । लाज मोठी हे आम्हां ॥७॥

कर्णनासापहारेण भगिनी मे विरूपिता । अस्य भार्यां जनस्थानात्सीतां सुरसुतोपमाम् ॥३॥
आनयिष्यामि विक्रम्य सहायस्तत्र मे भव । त्वया ह्यहं सहायेन पार्श्वस्थेन महाबल ॥४॥
भ्रातृभिश्चासुरान्सर्वान्नाहमत्राभिचिंतये । तत्सहायो भव त्वं मे समर्थो ह्यसि राक्षस ॥५॥
एतदर्थमहं प्राप्तस्त्वत्समीपं निशाचर । श्रृणु तत्कर्म साहाय्ये यत्कार्यं वचनान्मम ॥६॥
सौवर्णस्त्वं मृगो भूत्वा चित्रो रजतबिंदुभिः । आश्रमे तस्य रामस्य सीतायाः प्रमुखे चर ॥७॥

शूर्पणखेचें नासिक कर्ण । छेदोनि केलें विरूपपण । तीतें मी व्हाया उत्तीर्ण[4] । करीन हरण श्रीरामकांता ॥८॥

सीता स्वरूपवर्णन : सीतासौंदर्याची थोरी । मज पाहतां चराचरीं । तीसमान नाहीं दुसरी । परम सुंदरी श्रीरामप्रिया ॥९॥ सीता लावण्यमंजरी । उमा रमा न पवे सरी । माझ्या अंतरंगींची[5] नारी । तिच्या नखाग्रीं खद्योत ॥१०॥ मुख्य मंदोदरी जाण । नव्हे तिच्या अंगुष्ठासमान । तिचें मी करूं पाहें हरण । तरी सहाय आपण मज व्हावें ॥११॥

मारीचाकडे साहाय्याची मागणी व त्याची दिशा : तुजपायीं विचित्र गती । धरूं जाणसी नाना-व्यक्ती । सुवर्णमृगाची आकृती । धरून सीतेप्रती त्वां जावें ॥१२॥ सीता सांडोनि पंचवटीं । सुवर्णमृगवधार्थदृष्टी । राम धांवेल पाठोपाठीं । ऐसी गोष्टी साधावी ॥१३॥ दूरी नेवोनियां राघव । हाक मारावी अति अपूर्व । लक्ष्मणां वेगीं धांव पाव । हेंहीं लाघव साधावें ॥१४॥

मारीच श्रूयतां तात वचनं मम भाषत । आर्तोऽस्मि मम चार्तस्य भवान्हि परमा गतिः ॥८॥

मारीचा तूं माझा निजमंत्री । तुझी मी जाणें अगाध थोरी । तूं मज जालिया सहाकारी । मी चराचरीं निजविजयी ॥१५॥ सीताहरणीं मी अति आर्त[6] । तरी आर्त पुरवावया तूं समर्थ । माझे पुरवावे मनोरथ । कृतकार्यार्थ साधावा ॥१६॥ तूं साह्य जालिया संपूर्ण । देव दानव दैत्यगण । जिणों शकें मी रावण । तेथें श्रीराम कोण बापुडें ॥१७॥ तरी पर्णकुटिका सांडोन । तुवां नेलिया रामलक्ष्मण । मागें मी करीन सीताहरण । मग नको कोण मज म्हणे ॥१८॥ राहुग्रासी चंद्रकळा । तैसी हरीन जनकबाळा । मारीचसाह्याचा सोहळा । मी कळिकाळा नाटोपें ॥१९॥

मारीचाची प्रतिक्रिया : ऐकतां श्रीरामाचें नांव । मारीचाचा दचकला जीव । विसरला वाग्वैभव[7] । भयोद्भव[8] अनिवार ॥२०॥

तस्य रामकथां श्रुत्वा मारीचस्य महात्मनः । शुष्कमासीच्च वदनं परित्रस्तो बभूव सः ॥९॥

वना आला रघुनंदन । ऐकतां मारीच भ्रांतमन । तोंडीचें पाणी गेलें पळून । मूर्च्छापन्न तो पडिला ॥२१॥ नांव ऐकोनि रघुनाथा । मारीचास प्राणांतावस्था[9] । मग बोलणें चालणें खुंटली वार्ता । तेणें लंकानाथा आश्चर्य ॥२॥ मारीच महावीर शूर । रणामाजी रणरंगधीर । योद्ध्यांमाजी मुख्य जुंझार । विचारसमुद्र पैं मारीच ॥२३॥ भय ओढवल्या[10] थोर । मज मारीचाचा आधार । याचेनि बळें म्यां सुरासुर । चराचर जिंकिलें ॥२४॥ कार्य मांडल्या अति अवघड । समूळ साधी अर्थ गूढ । तैसाचि निधडा[11] योद्धा दृढ । विचारप्रौढ विवेकी ॥२५॥

---

शब्दार्थ – १. धरण्यास कठिण, २. नाहीसे केले, ३. कोट्यावधी राक्षस, ४. उतराई, ५. अंतःपुरातील, ६. उत्सुक, ७बोलणे, ८. भयाची उत्पत्ती, ९. मरणावस्था, १०. उत्पन्न झाल्यास, ११. धैर्याचा.

त्याचे कारण : घावो फार न लागतां । केवळ श्रीरामनाम ऐकतां । मारीचास मरणावस्था । भयकंपता कां जाली ॥२६॥ श्रवणीं ऐकतां श्रीरघुनंदन । धाकें चेतना गेली पळोन । निर्जीव भासे प्रेतवदन । प्राणस्फुरण पळालें ॥२७॥ जैसा जड मूढ पाषाण । तैसा मारीच मूर्च्छापन्न । त्यासी वेगीं दशानन । सावधान स्वयें करी ॥२८॥ मारीचास पुसे लंकानाथ । न लागतां घावो ना आघात । नांव ऐकतां श्रीरघुनाथ । मूर्च्छा मरणांत कां आली ॥२९॥

रावणास कळकळीचा उपदेश, शूर्पणखेचा धिक्कार : मारीच होवोनि सावधान । रावणासी घाली लोटांगण । श्रीरामासीं विरुद्धपण । सर्वथा आपण न करावें ॥३०॥ क्षोभलिया श्रीरामचंद्र । ससैन्य सबंधु सपुत्र । सप्रधान निशाचर । तुजसहित निर्दळील ॥३१॥ सहितसैन्य चवदा सहस्र । जैसें वधिले त्रिशिरा खर । तैसें तुम्हांसी समग्र । बाणीं रघुवीर बधील पैं ॥३२॥ सुटल्या श्रीरामाचा बाण । तुम्हांमाजी निवारील कोण । राक्षसकुळाचें निर्दळण । न लागतां क्षण तो करील ॥३३॥ तरी तुझें सद्बुद्धीचें हरण । कोणें क्रूरें केलें संपूर्ण । जे श्रीरामाचें दारहरण[1] । केंवी आपणा करवेल ॥३४॥ शेषमाथींचा निजमणी । आणूं शकेल सांग कोणी । तेंवी सीता श्रीरामापासोनी । केंवी आमुचेनि आणवे ॥३५॥ श्रीसूर्याची प्रभावळी । हरूं न शके महाबळी । तेंवी श्रीरामावेगळी जनकबाळीं । न करवेचि पैं आम्हां ॥३६॥ जैसी सर्वांगीं पडली व्योमा । वेगळीं न करवे नीळिमा[3] । तेंवी सीता वेगळी श्रीरामा । सर्वथा आम्हां न करवे ॥३७॥ ऐसेनि करितां सीताहरण । आम्हां तुम्हां आलें मरण । सकळ कुळाचें निर्दळण । होईल जाण लंकेशा ॥३८॥ नकटीं होवानियां आधीं । ससैन्येंसी खरू वधिला युद्धीं । तरी शूर्पणखेची मूढ बुद्धी । ऐकतां त्रिशुद्धी निमशील[4] ॥३९॥

परस्त्रीहरणाचे दुष्परिणाम : सहस्रबाहु गर्वेकरीं । ऋषींची धेनु बळें हरी । त्यातें ब्रह्मचारी मारी । क्षणामाझारी ससैन्य ॥४०॥ करितां परदारहरण । अवश्य आम्हां आलें मरण । म्हणोनि मारीच रावणचरण । धरी तंव रावण क्षोभला ॥४१॥

रावणाचा क्षोभ व मारीचावर राग : दोघें माणसें वनवासी । नाहीं सैन्यसामुग्री त्यांसी । त्यांचें भय मज दाविसी । तरी तूं जालासी नपुसंक ॥४२॥ तूं तंव बळिष्ठ संपूर्ण । ते काय जाली आंगवण[5] । होतां श्रीरामनामस्मरण । कंपायमान कां होसी ॥४३॥ मी तंव रावण दुर्धर । बंदीं घातले ग्रह सुरवर । श्रीराम बापुडें किंमात्र[7] । त्याचें भय थोर धुरा[8] ॥४४॥ तेथे कोण पाड श्रीरामचंद्रा । धाकुटा हाही निशाचरा । धरीं धीर पुरा मारीचा तूं ॥४५॥ ऐकोनि रावणाचें वचन । मारीच जाला हास्यवदन । रावणा न धरीं गर्वाभिमान । पूर्ण कथन अवधारीं ॥४६॥

पुरा वीर्यादहं राजन्पर्यटन्पृथिवीमिमाम् । बलं नागसहस्रस्य धारयन्पर्वतोपमः ॥१०॥
अवजानन्नहं संमोहाद्बालोऽयमिति राघवम् । विश्वामित्रस्य तां वेदिमभ्यधावं कृतत्वरः ॥११॥

मारीच स्वतःचा अनुभव सांगतो : तुझ्याच ऐसा लंकानाथा । मज पूर्वी बळदर्प होता । जे बाळ मानोनि रघुनाथा । त्याच्या विघाता करूं गेलों ॥४७॥ अंगीं नागायुतबाळ[9] । श्रीराम सगळें गिळीन बाळ । विश्वामित्रादि ऋषी सकळ । मारोनि तत्काळ भक्षीन ॥४८॥ ऐसी धरोनियां हांव । आश्रमीं घेतली धांव । तंव निःशंक धनुर्वाडा[10] राघव । बाणलाघव अनिवार ॥४९॥ मारीच सुबाहु महावीर । सवें निधडे निशाचर । मारूं जातां श्रीरघुवीर । बाण दुर्धर सूटले ॥५०॥ राक्षस देखोनियां क्रूर । डळमळीना श्रीरामचंद्र । सुटला बाणांचा महापूर । वीरें वीर खोंचले ॥५१॥ माझा मुद्गल केला कूट । सुबाहूचें ओढणें[1] केलें पीठ । वीर पाडिलें

---

शब्दार्थ - १. स्त्रीचे हरण, स्त्री पळविणे, २. आकाशाला, ३. निळेपणा, ४. मरशील, ५. गर्वाने, ५. सामर्थ्य, ७. कःपदार्थ, ८. पुढारी, ९. दहा हजार हत्तींचे बळ, १०. धनुर्धर.

उद्भट । ऐसा रणसुभट श्रीराम ॥५२॥ श्रीरामें बाण सोडिला तिधारा । तो म्यां तोडिला खर्गधारा । भल्लानें सुबाहु केला पुरा । मज पिसारा लागला ॥५३॥ पिसारा लागला ब्रह्मांडीं । तेणें डोळां आली झांपडी । अंगीं भोवंडी अशुद्ध नाकीं तोंडीं । बळे मुरकुंडी हातां पायां ॥५४॥ बाण पिसाऱ्याचा दुर्धर वारा । घायें उडविलें अंबरा । शतयोजनें समुद्रतीरा । मूर्च्छापन्न पुरा पाडिलों ॥५५॥ वटारिले[२] नेत्रवाट । घरघरीत वाजे कंठ । धाकें धुकधुकितसे पोट । प्राणसंकट मज आलें ॥५६॥ अर्धोन्मीलित जाले नयन । प्राण जाला अति सुलीन । शरीर जालें अचेतन । बाणार्धखंडें मरण मज आलें ॥५७॥ उरला होता आयुष्यकण । तेणें मी जालों सावधान । घायें गेली आंगवण । धैर्य संपूर्ण पळालें ॥५८॥ श्रीरामबाणाचा भेदरा[३] । थोर लागला दशशिरां[४] । सर्वत्र देखोनि श्रीरामचंद्रा । चराचरामाझारीं ॥५९॥

वृक्षे वृक्षे हि पश्यामि चीरकृष्णाजिनांवरम् । गृहीतधनुषं रामं पाशहस्तमिवान्तकम् ॥१२॥
अपि रामसहस्राणि भीतः पश्यामि रावण । राभूतमिदं सर्वमरण्यं प्रतिभाति मे ॥१३॥
राममेव हि पश्यामि रहिते राक्षसेश्वर । दृष्ट्वा स्वप्नगतं राममुभ्द्रमामीव चेतनः ॥१४॥

चीरकृष्णाजिनांबर । जटामुकुटधर्नुधर । देखें वृक्षोवृक्षीं श्रीरामचंद्र । प्रळयरुद्र मारक ॥६०॥ भयभीत चकितदृष्टी । श्रीराम देखें कोट्यनुकोटी । श्रीराममय ही सृष्टी । धाक पोटीं बाणाचा ॥६१॥ पक्षी सावज वनीं फडके । श्रीराम म्हणोनी मी वचकें । लहान थोर जें जें देखें । तें तें श्रीराम देखें धगधगीत ॥६२॥ देखतां वृक्षांची दाटी । श्रीरामचि देखें दृष्टीं । धाकें गजबजिलों पोटीं । ऐसी श्रीरामें पाठी पुरविली ॥६३॥ स्वप्नाचिये परिपाटीं । श्रीराम देखें दृष्टीं । श्रीरामाचा धाक पोटीं । श्रीरामें पाठी पुरविली ॥६४॥ श्रीरामबाणाचा पिसारा । तेणें ऐसा लाविला भेदरा[५] । तरी विरोधितां श्रीरामचंद्रा । उरी निशाचरां उरेना ॥६५॥ श्रीरामधाक मज मानसी । त्या मज धाडितां रामापासीं । जीव जाईल देखतां त्यासी । निश्चयेंसीं रावणा ॥६६॥ रकारादि वर्णजल्प । ऐकतां मजला थोर कंप । श्रीरामनामाचा आलाप । तणें सकंप सर्वदा ॥६७॥

रावणाला परावृत्त करण्याचा कळकळीने प्रयत्न : श्रीरामाच्या पूर्वार्धबाणें । जीव वांचला दैवगुणें । आतां त्यांपासीं जाणें । तैं तो मज प्राणें सोडीना ॥६८॥ जैं मज मागें विंधिला बाण । तैं रामा होते बाळपण । आतां तारुण्य संपूर्ण । घायें प्राण घेईल ॥६९॥ देखतांचि श्रीरघुनाथ । माझे जीवित्वाचा अंत । मी सर्वथा नवचें[६] तेथ । त्रिसत्य सत्य मद्वाणी ॥७०॥

रावणाचे प्रलोभन : ऐसें सांगोनि रावणासी । मारीच रडे उकसाबुकसीं । मग रावणें धरोनि पोटासीं । काय त्यासी बोलत ॥७१॥ मनुष्य खाजुकें[७] आम्हांसी । त्या रामातें तूं कां भीसी । सीता साधल्या मजसीं । अर्धराज्यासी देईन ॥७२॥ जैसा माझा ज्येष्ठ कुमरू । त्याहूनि करीन राजधरू । तुज मी देईन छत्र चामरू । सैन्यसंभारू गज वाजी ॥७३॥ सांडी रामभयाची धुकधुक । अर्धराज्य देईन देख । निधडा होई निःशंक । माझी भाक तूं घेईं ॥७४॥

मारीचाचे उत्तर : तरी मेल्यामागें पिंडदान । ते भक्षितीं कागश्वान[८] । श्रीरामें घेतलिया माझा प्राण । राज्य कोण भोगील ॥७५॥ तुझी बुद्धि ऐकतां जाण । ना मारीच ना रावण । ऐसें करील श्रीरामबाण । कुळनिर्दळण राक्षसां ॥७६॥ नकटीची केवळ दुर्बुद्धी । तिणें भेदिली

शब्दार्थ – १. ढाल, २. डोळे, ३. भय, ४. रावणा, ५. भीती, ६, जात नाही, येत नाही, ७. भक्ष्य वस्तू, ८. कावळे व कुत्रे.

तुझी बुद्धी । परदारहरणविधी[1] । करी तो त्रिशुद्धि महामूर्ख ।।७७।। देखतां नकटीचा मुखवट । तत्काळ बुद्धीस होय पालट । जालासी परदारलंपट । शठ नष्ट महापापी ।।७८।। होतां नकटीचें दर्शन । निमाला त्रिशिरा खर दूषण । आतां निर्दाळावया रावण । नकटें वदन आणिलें ।।७९।। स्वयंवरीं वरावया सीतेतें । धनुष्य वाहतां अति स्वार्थे। धनुष्य न उचलतां तूतें । तें श्रीरामें भंगिलें ।।८०।। तैं काय झाली आंगवण । कां न केलें सीताहरण । सभेसी जालें काळें वदन । घेवोनि प्राण पळालासी ।।८१।। तूं पळसी विराधाभेणे । तो श्रीरामें मारिला न लागतां क्षण । तेथें तूं बापुडें रावण । मशक कोण संग्रामीं ।।८२।। शूर्पणखेची दुष्ट बुद्धीं । श्रीरामदारहरणविधी । बाणीं दाही मस्तकें छेदी । तेणें त्रिशुद्धी निमशील ।।८३।। स्वामीची वासना पुरवित । संवादीं मिळतील बहुत । परी यथार्थ धर्म परमार्थ । सांगता आप्त दुर्लभ ।।८४।। ऐक बापा लंकानाथा । म्यां सांगितलें यथार्थता । तें जैं न माने तुझिया चित्ता । तैं माझी कथा अवधारी ।।८५।। होतां श्रीरामदर्शन । तत्काळ जाईल माझा प्राण । तेथें मी न वचें वाहिली आण । तेणें रावण क्षोभला ।।८६।।

**रावणाचा संताप व मारीचाला ठार करण्याचा मानस :** श्रीराम तुझा घेईल प्राण । ती मी मारितां राखेल कोण । वर्मी खोंचला रावण । तुझें निर्दळण माझेनि ।।८७।। आज्ञाभंगो[2] नरेंद्राणां । राजाज्ञेचें उल्लंघन । करिता रायें करावें हनन । संदेह जाण न करावा ।।८८।। सेवक मोडी स्वामीचें वचन । यदर्थ शास्त्रविधिविधान । सेवकासी करावें हनन । हे तुझें मुख्य मरण माझेनि ।।८९।। श्रीराम मानव रंक तापसी । त्याचें भय मज दाविसी । तो मी गिळीन एका घासीं । लक्ष्मणासीं समवेत ।।९०।। मी तंव क्षोभल्या रावण । धाकें निमती राम लक्ष्मण । मग सीतेचें पाणिग्रहण । मी करीन प्रतापें ।।९१।। मारीचाचा करावया घात । कोपें खवळला लंकानाथ । तंव मारीच पडला विचारांत । उभयथा मृत्यु मज आला ।।९२।।

रामादपि च मर्तव्यं मर्तव्यं रावणादपि । उभाभ्यामपि मर्तव्यं वरं रामो न रावणः ।।१७।।

**रावणाच्या हस्ते मरण्यापेक्षा श्रीरामांच्या हातून मरण येणे उत्तम म्हणून मारीचाची कबुली :** जातां पंचवटीआंत । अवश्य वधील श्रीरघुनाथ । आणि तेथें न वचतां अनर्थ । लंकानाथ वधील ।।९३।। रावणाचे हातें मरण । तैं मज जालें अधःपतन । आणि लागतां श्रीरामबाण । कृतकल्याण मज तेणें ।।९४।। अति दुर्धर श्रीरामबाण । घायें वारील जन्ममरण । ज्यासी लागे तो सुखसंपन्न कृतकल्याण रामबाणें ।।९५।। ऐसें विचारोनि चित्ता । मारीच म्हणे लंकानाथा । बोलिलों श्रीरामभयाची वार्ता । तुझ्या पुरुषार्था पहावया ।।९६।। करावया श्रीरामासीं रण । तुझी कैसी आंगवण । तूं तंव अति पुरुषार्थी रावण । तरी साह्य पूर्ण मी तुज ।।९७।। हरावया श्रीरामकांता। सर्वस्वें वेंचीन जीविता । निमेषें प्रलोभोनि सीता । मृगवेषतावैभवें ।।९८।। ऐसें ऐकोनि मारीचवचन । सुखावला दशानन । मग धांवोन दिधले आलिंगन । आणि कंठाभरण अर्पिलें ।।९९।। ऐशा दोघीं करोनि गुजगोष्टी । मग बैसोनि रथपृष्ठीं । ठाकोनि आलें पंचवटी । श्रीरामजगजेटठी जे ठायीं ।।१००।। मागें ठेवोनि सारथि रथ । दोघे आले वनाआंत । मग मारीचासी म्हणे लंकानाथ । कृतकार्यार्थ साधावा ।।१।। कामीकमनीय[3] मृग रूपता । धरोनि सवेग प्रलोभोनि सीता । दूरी न्यावें श्रीरघुनाथा । सौमित्रभ्रात्यासमवेत ।।२।। येतां देखोनि रामबाणासी । अदृश्य व्हावें लाघवेंसीं । तंव मी हरीन जानकीसी । मग लंकेसी जाऊं

शब्दार्थ - १. दुसऱ्याची बायको पळविणे, २. राजाची आज्ञा मोडणे, ३. विलासी जनास रमणीय वाटणारी

दोघे ॥३॥ ऐसी आप्तवें सांगोनि गोष्टी । हरिखें त्याची पाठी थापटी । परम प्रीती धरोनि पोटीं । पंचवटीं प्रवेशले ॥४॥ करितां जानकीचें हरण । धाकती[1] मारीच आणि रावण । एकाजनार्दना शरण । कथाविंदान अवधारा ॥५॥ पुढील श्रीरामचरित्र । अति गुह्य आणि विचित्र । श्रवणें पातकी होती पवित्र । चिदचिन्मात्र[2] श्रीराम ॥६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां मारीचरावणपंचवट्यागमनं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१॥ ओंव्या ॥१०६॥ श्लोक ॥१५॥ एवं ॥१२१॥

## अध्याय चौदावा

### हरिणरूपी मारीचाचा वध

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

रावणाचे पंचवटीत आगमन, तेथील विध्वंस पाहून त्याची बिकट अवस्था : श्रीरामाश्रम पंचवटीं । रावण देखोनि आपुल्या दृष्टीं । मारिल्या राक्षसांच्या कोटी । तेणें पोटीं दचकला ॥१॥ राक्षसांचीं दीर्घ मढीं । पडलीं देखोनि करवंडीं[3] । मारीच अत्यंत हडबडी । खाजवी शेंडी भयभीत ॥२॥ आधींच श्रीरामभयें भीत । त्यावरी देखोनि राक्षसघात । मारीच चळचळां कांपत । जे राक्षसां अंतक श्रीराम ॥३॥

मारीचाचा अनुनय : देखोनि राक्षसांचे कंदन । मारीचास स्वयें रावण । अत्यंत देऊन सन्मान । त्याचे चरण दृढ धरिलें ॥४॥ सीताहरण अति निर्वाण । खुंटलें स्वामिसेवकपण । कृपा करोनि आपण । जानकीहरण साधावें ॥५॥ ज्यालागीं आमुचें आगमन । तें कार्य तो साधावें आपण । दावोनियां मायामृगमोहन[4] । सीताहरण मज साधीं ॥६॥

स रावणवचः श्रुत्वा मारीचो राक्षसाधिपः । मृगो भूत्वाश्रमपदे रामस्य विचचार ह ॥१॥

रुक्मबिंदुशतैश्चित्रः प्रवालमणिभूषितः । मुक्ताजालपरिच्छन्नः स बभूव मनोहरः ॥२॥

मारीचाची मनस्थिती : ऐकोनि रावणाचें वचन । मारीच म्हणे आलें मरण । श्रीरामबाणें देतां प्राण । तैं आपण अति धन्य ॥७॥ अंती करी तो रामस्मरण । तो स्वयें होय ब्रह्म पूर्ण । त्याचा लागलिया निजबाण । कृतकल्याण होईन मी ॥८॥ श्रीरामाच्या बाणघातीं । दासी होती चारी मुक्ती । अनायासें ब्रह्मप्राप्ती । श्रीराममूर्ति देखिलिया ॥९॥ ऐसें विचारोनि चित्तीं । रावणा सुख द्यावया अंतीं । जाला विचित्रमृगाकृती[5] । लंकापति विस्मित ॥१०॥

मारीचाचे हरिणस्वरूप, त्याचे वर्णन : नाहीं सांडीमांडी गेली । नाहीं फेडीवेडी देखिली । घवकरी[6] मृगशोभा शोभली । पडली भुली लंकानाथा ॥११॥ तनु मनोहर सोनसळी । रत्नबिंदु रोममूळीं । पृष्ठीं शोभे मुक्ताफळीं । नभोमंडळीं जेंवी तारा ॥१२॥ खुर आरक्त प्रवाळवर्णी । कळावया[7] मरकतमणी । पाचुबिंदु उमटले श्रवणीं । कर्णाभरणीं अति शोभा ॥१३॥ इंद्रनीळशृंगें रत्नमुरडी । आरक्त नेत्र जिव्हा तांबडी । ठाणठकारपरवडी । मृगशोभा गाढी शोभत ॥१४॥ शृंगाग्रीं मणी लखलखती । पुच्छ तळपे सिंदूराकृती । शुभ्र उदर हंसस्थिती । विचित्राकृति मृगशोभा ॥१५॥ अंगींच्या तेजाची प्रगल्भा । लोपती रविचंद्रांची प्रभा । सोलींव लावण्याचा गाभा । मृगशोभा शोभत ॥१६॥

मृगाचे अंगविक्षेप, सर्वांस आश्चर्य : ऐसा चवकत बिचकत । चकितदृष्टीं चपळ पाहत ।

---

शब्दार्थ - १. भिऊ लागले, २. चैतन्य व जड एतद्रूपी, ३. तुकडे होऊन, ४. कपटी मृगरूपाने भुलवून, ५. आश्चर्यकारक मृगरूप धारण करणारा, ६. मोहकारक, ७. हस्तभूषणे, ८. घाबरलेला.

कांही चरत कांहीं फडकत । आश्रमांत स्वयें आला ॥१७॥ रिघोनियां पंचवटीं । सन्मुख सीतेचिया दृष्टी । श्रीराम देखे जगजेठी । ऐसा निकटीं विचरत ॥१८॥ श्रीरामापासोनि फडके दुरी । निकट विचरे सीतासुंदरी । सर्वांगें दावोनि साजरीं । क्षणामाझारीं मोहिली ॥१९॥ मृगासीं होतां दृष्टिभेटी । हर्ष जानकीचे पोटीं । त्याचें लावण्य देखतां दृष्टीं । आल्हाद पोटीं सीतेसी ॥२०॥ देखोनि मृगाचे अवयव । सीतेसी सुख अभिनव । परम सुखें सुखावे जीव । जडला भाव[1] मृगस्वरूपीं ॥२१॥ त्याचें पहावया स्वरूप । सीतेसी अतिशयें साक्षेप[2] । तंव तो आला अति समीप । आपलें स्वरूप दावावया ॥२२॥ सीता अंग प्रत्यंग न्याहाळी । जवळ येवोनि कुरवाळी । तंव मृदुरोमा तनु कोंवळी । दोहीं करतळीं निवारी ॥२३॥ देखोनि मृगशोभा अत्यंत । स्वर्गीं सुरवर जाले भ्रांत । कोण कोणाचा कैंचा येथ । महा अद्‌भुत हा मृग ॥२४॥ देखोनियां मृगाकृती । ऋषीश्वर पडले भ्रांतीं । तटस्थ ठेली चित्तवृत्ती । अवघे पाहती टकमकां ॥२५॥

मृग पाहून सीतेला त्याचे आकर्षण : होतां मृगाचें दर्शन । मृग आकर्षी सीतानयन । मृगसौंदर्या वेधलें मन । लागलें ध्यान मृगाचें ॥२६॥ हर्षें सांगे श्रीरामासी । उल्हासें बोले लक्ष्मणासी । मृगसौंदर्या शोभा कैसी । हेमांगेंसीं[3] रत्नावळी ॥२७॥ वनें हिंडता कोट्यनुकोटी । ऐसिया मृगेंसीं नव्हे भेटी । मज पाहतां निजदृष्टीं । ऐसा मृग सृष्टीं नसेल ॥२८॥ हा नाहीं स्रष्ट्यानें[4] स्रजिला । नाहीं कर्मजन्य जन्मला । निखळ[5] लावण्याचा ओतिला । दैवें धाडिला मजलागीं ॥२९॥

सीतेची श्रीरामांना विनंती : ऐसें सीता बोले आपण । श्रीरामा घाली लोटांगण । जें मज अपूर्व मागणें दान । तें आपण मज द्यावें ॥३०॥ तूं तंव उदार चक्रवर्ती । मी मागतें अति प्रीतीं। कृपा करावी श्रीरघुपती । कृपामूर्ति कृपाळुवा ॥३१॥ म्हणोनि चरण धरिले लल्लाटीं । अश्रु भरले नेत्रवाटीं । सलज्ज पाहे गोरटी । श्रीरामदृष्टी लक्षोनी ॥३२॥ मृगत्वचा अति कोवळी । हेमरत्नें शोभे मुक्तावळी । अयोध्याप्रवेशनकाळीं । त्याची कांचोळी करीन मी ॥३३॥ येथोनि अयोध्या प्रवेशावयास । उरली अवधी षण्मास । तरी ते कंचुकीची बहुत आस । तुम्हीं उदास न व्हावें ॥३४॥ दिव्यालंकारभूषण । त्याहूनि त्वचा शोभायमान । तियेपुढें नवरत्न । खद्योत जाण श्रीरामा ॥३५॥

इति सीतावचः श्रुत्वा दृष्ट्वा च मृगमद्‌भुतम् । उवाच राघवो हृष्टो भ्रातरं लक्ष्मणं वचः ॥३॥
पश्य लक्ष्मण वैदेह्याः स्पृहामुल्लसितामिमाम् । रूपश्रेष्ठतया ह्येष मृगोद्य न भविष्यति ॥४॥
न वने नंदनोद्देशे न चैत्ररथसंश्रये । कुतःपृथिव्यां सौमित्रे योऽस्य कश्चित्समो मृगः ॥५॥

राम-लक्ष्मण संवाद : मृगाचे हृदयींचें हृद्गत । जाणोनि सीतेचें मनोगत । संतुष्टला श्रीरघुनाथ । कर्तव्यार्थ लक्षोनी ॥३६॥ श्रीराम म्हणे गा सौमित्र । पाहें पां कैसा मृग सुंदर । ठाणमाणें[6] अति गंभीर । हेमशरीर रत्नांक ॥३७॥ ऐसा मृग नंदनवनीं । पूर्वी नाहीं देखिला नयनीं । नाहींच चित्ररथवनीं । ऐसा त्रिभुवनीं असेना ॥३८॥ वनें हिंडतां दिक्पुटीं[7] । ऐशा मृगासी नाहीं भेटी । लावण्यमृगाची कसवटी । नाहीं दृष्टीं देखिली ॥३९॥ या मृगत्वचेची कांचोळी । सप्रेम मागे जनकबाळी । अयोध्याप्रवेशाचिये काळीं । स्वयें वेल्हाळी लेऊं पाहे ॥४०॥ जे अपूर्व मजकारणें । प्रथम सीतेचें मागणें । नेदीं म्हणता लाजिरवाणें । मृग मारणें

शब्दार्थ – १. लोभ, २. आग्रह, ३. सुवर्णमय, शरीराने, ४. ब्रह्मदेवाने, ५. सर्व, ६. अंगाच्या बांध्याने, ७. आठही दिशांमध्ये.

त्वचार्थ ॥४१॥ सीतेच्या मागण्यासाठी । मृगवधार्थ श्रीराम उठी । हेमाभरणी धनुष्य मुष्टीं । बाण पृष्ठीं सज्जुनी ॥४२॥ श्रीरामें मांडोनियां ठाण । धनुर्ष्यी वाहिलासे गुण । सितीं[1] लाविलासे बाण । मृग लक्षोन निघाला ॥४३॥

यावत्पृषतमेकेन सायकेन निहन्म्यहम्। हत्वैतच्चर्म चादाय शीघ्रमेष्यामि लक्ष्मण ॥६॥

सीतेची हौस पुरविली पाहिजे : लक्ष्मणा ऐकें सावधान । बाणें एकें मृग मारीन । मृगचर्म शोभायमान । सीतेसी देईन सुखार्थ ॥४४॥ मृगचर्म आलिया हाता । परम सुखें सुखावे सीता । ऐकें तिच्या मनोगता । उभयभागता विभागूं ॥४५॥ अर्धचर्माची कंचुकी पूर्ण । अर्धचर्माचें मज आसन । करितां अयोध्याप्रवेशन । शोभायमान आम्हां दोघां ॥४६॥ मृगचर्माचें भूषण । एक कंचुकी एक आसन । ऐसें सीतेचें भावीं[2] मन । पतिवंचन करूं नये ॥४७॥ उत्तम अन्न आणि पक्वान्न । वस्त्रें अलंकार आणि भूषण । पतीवीण भागी आपण । ते स्त्री जाण समवेश्या ॥४८॥

अहमेतद्धनिष्यामि मृगरत्नं न संशयः । इह त्वं भव सन्नद्धः शस्त्रवान्रक्ष मैथिलीम् ॥७॥
यावद्गच्छामि सौमित्र मृगमानयितुं वनम् । न गंतव्यमितोऽन्यत्र यावन्नाहमिहागतः ॥८॥
राक्षसाहृष्टभावत्वाद्धितर्का: संभवंति हि । तथा तु तुं समादिश्य भ्रातरं तु पुनः पुनः ॥९॥

आपण परत येईपर्यंत आश्रमातून कुठेही जाऊ नये असा लक्ष्मणाला दंडक : असो हे ऐसी सीतेची कथा । लक्ष्मणा सावध ऐक आतां । मृग मारोनि मज न येतां । तिळभर परता होऊं नको ॥४९॥ मृग मारीन मी निश्चित । जरी मिळाले त्रैलोक्यींचे दैत्य । तरी मी मागें न सरें श्रीरघुनाथ। संशय येथ न मानावा ॥५०॥ राक्षसांसीं पडिले हाडद्वंद्व । तुवां नसावें असावध । शस्त्रास्त्रीं असावें सन्नद्ध । सीता सावध रक्षावी ॥५१॥ गुज सांगे सौमित्रकानीं । राक्षस मायावी ये वनीं । सीता नेतील छळोनी । सावधानीं रक्षावी ॥५२॥ मृग मारोनि मी यें जंववरी । तुवां न व्हावें येथोनि तिळभरी दूरी । संकट आलियाही जीवावरी । धीरें निर्धारीं सहावें ॥५३॥ मजविषयीं काहीं चिंता । तुवां न करावी गा सर्वथा । सावधानें राखावी सीता । मागुतमागुता सांगत ॥५४॥ अति संकट देखसी दृष्टीं । तरी न सांडावी पर्णकुटी । तुणे कानीं सांगेन गुह्य गोष्टी । सीता गोरटी रक्षावी ॥५५॥ सन्मुख आलिया राक्षसकोडी । अंगाचिया निजप्रौढीं । युद्धा न निघावें तांतडीं । सीता रोकडी ते नेतील ॥५६॥ तुज गोंवोनि संग्रामासीं । राक्षस नेतील सीतेसी । झणीं सीतेसी विसंबसी । निश्चयेंसीं तुज सांगें ॥५७॥ तूं चढतां संग्रामपृष्ठीं । मुख्य जानकी नाठवे पोटीं । मग एकली देखोनि पर्णकुटीं । राक्षस कपटी हरतील ॥५८॥ म्यां सांगितल्या ज्या ज्या युक्ती । त्या सुदृढ धराव्या चित्तीं । नाना परीच्या उपपत्तीं[3] । सीता सती रक्षावी ॥५९॥ ऐसे सौमित्रा सांगोन । वेगें निघे मृग लक्षून । सवेंचि परतोनि येऊन । सांगे पुन्हा सीता रक्षावी ॥६०॥

मृगाने हूल दाखवून श्रीरामांना लांब नेले : वारंवार करोनि नेम । मृगवधार्थी निघे राम । धनुष्यबाणाचा आक्रमें[4] । अति संभ्रमें[5] तद्वधीं ॥६१॥ श्रीराम देखोनी धनुष्यमुष्टी । मृग फडके चकितदृष्टी। सांडोनियां पंचवटी । उठाउठीं[6] पळतसे ॥६२॥ शूर्पणखेचें नासिकाच्छेदन । तेथें मृगाचें आगमन । येतां देखोनि श्रीरघुनंदन । सवेग गमन तेणें केलें ॥६३॥ राम देखोनियां दुरी । मृग चाटी पाठीवरी । तया स्थळा नांव चाटोरी । गंगातीरीं अद्यापि ॥६४॥ श्रीराममुखचंद्र न्याहारीं[7] । तया स्थळा नाव चांदोरी । श्रीराम न्यावा बहुत दुरी । निघे झडकरी मृग वेगें ॥६५॥

शब्दार्थ - १. धनुष्याच्या दोरीला, २. इच्छी, ३. युक्तीनी, ४. स्वीकार, ५. आवेश, ६. लगबगीने, ७. पाहा.

काहाडोनि न्यावा रघुवीर । मृग फडकला मध्यमेश्वर । दावळे[1] दावोनि श्रीरामचंद्रा । मृग पुढारां चालिला ॥६६॥ दुरी अंतरावया पंचवटी । मृग पळाला गंगातटीं । श्रीराम धांवे पाठोपाठीं । धनुष्य मुष्टीं सज्जोनि ॥६७॥ कोठें देतो दृष्टी भेटी । कोठें पाहतां न दिसे सृष्टीं । श्रीराम मृगाची न सांडी पाठी । दृढ बाणाटी सज्जोनि ॥६८॥ कोठे दिसे कोठें न दिसे । कोठे उडे मृगविन्यासें[2] । श्रीराम धांवे अति आवेशें । बाण सपिच्छ विंधावया ॥६९॥

निरनिराळ्या ठिकाणच्या खुणा व त्यांची नावे : देखोनि श्रीरामाचा बाण । मृग वेगें सोडी ठिकाण । त्या ठाया नांव ठाण । सावधान अवधारा ॥७०॥ प्रथम कुंकुमठाण । मातुळठाण नागठाण । बादामठाण पांचवें तें भौमठाण । मृग ठिकाण सोडित ॥७१॥ मृगपाप छेदी श्रीरामरावो । तो छिन्नपाप देहगांवों । नेऊर[3] विंधोनि पाडिला पहाहो । तो नेउरगांवो तेथें कीं ॥७२॥

श्रीरामांचा बाण लागताच मारीचाने श्रीरामांच्या आवाजात मारलेली हाक : भाळ भेदलें जिव्हारीं । तो भाळगांव गंगातीरीं । लक्ष्मणा धांव झडकरी । गिरागजरीं मृग पडिला ॥७३॥

संप्राप्तकालमाज्ञाय चकार सुमहास्वनम् । सदृशं राघवस्येव हा सीते लक्ष्मणेति च ॥१०॥
हा लक्ष्मणेति चुक्रोश त्राहीति महता वने । स्वरमेनं तु संश्रुत्य लक्ष्मणस्तां प्रहास्यति ।
लक्ष्मणेन विहीनां तां मैथिलीं रावणो हरेत् ॥११॥

लागतां श्रीरामाचा बाण । करोनि सप्तपाळ उड्डाण । मारीच सांडी निजप्राण । पाव लक्ष्मणा म्हणोनि ॥७४॥ मारीच महामावकर । श्रीराम स्वरासारिखा स्वर । करोनि आक्रंदे दुस्तर । दीन उत्तर तें ऐका ॥७५॥ लक्ष्मणा वेगीं धांव पाव । मिळोनि राक्षससमुदाव । रणीं निरोधें निरोधिल पहा हो । महाबाहो धांव वेगीं ॥७६॥ तूं तंव माझा निजसखा । रणभूमीचा पाठिराखा । राक्षसीं मारिलें मारिलें देखा । रणमोचका पाव वेगीं ॥७७॥ ऐसिया युक्तीं आक्रंदोन । मृगपाचा त्याग करोन । मारीच राक्षस होतां जाण । घेतला प्राण श्रीरामबाणें ॥७८॥

मारीच राक्षसास उत्तम गती : मृगदेह राक्षसदेहो । स्थूळलिंगकारणदेहो । श्रीरामें छेदोनि निःसंदेहो । मारिला पहाहो मारीच ॥७९॥ मरणें मारिले जन्मासहित । देही विदेही केला घात । माया मारोनियां समस्त । बाणें अत्यंत सुखी केला ॥८०॥ श्रीरामाचा निजबाण । ज्यासी लागे तो सभाग्य पूर्ण । बाण नव्हे हा आनंदघन । सुखसंपन्न श्रीरामें ॥८१॥ स्थूळ देहातें छेदित । ते योद्धे देखिले बहुत । परी जीवीं जीवपणा करी घात । श्रीरघुनाथ निजयोद्धा ॥८२॥ छेदोनियां भयाभय शोक । छेदोनियां द्वंद्वदुःख । श्रीरामें दिधलें महासुख । सुखाचें सुख श्रीराम ॥८३॥ मारीचानें नेम केला देख । श्रीरामबाणें पावेन सुख । तें रामें दिधलें आवश्यक । शत्रु सेवक समपदीं ॥८४॥ जें सुख भोगिती सनकादिक । तेंचि सुख मारीचास दे आवश्यक । बाप कृपाळु रघुकुळटिळक । सुखदायक संग्रामीं ॥८५॥

मारीचानें मारलेल्या हाकेमुळे श्रीराम साशंक : यापरी श्रीरामें आपण । मारीच मारिला विंधोनि बाण । धांव पाव गा लक्ष्मण । रघुनंदन साशंके ॥८६॥ मारीच आक्रंदाची हाक । दुमदुमिले तिन्ही लोक । हें सौमित्र ऐकोनि देख । येईल आवश्यक धांवोन ॥८७॥ धांवण्या आलिया लक्ष्मण । अनर्थ होईल दारुण । मागें येवोनि रावण । सीताहरण करील ॥८८॥ जरी लक्ष्मण न येईल तत्वतां । तरी त्यासी राहूं न देईल सीता । बोल बोलेल

शब्दार्थ - १. डावा भाग, २. हरिणाच्या गतीने, ३. पायाचा घोटा.

उत्पातता[1]। अति त्रासता धाडील ॥८९॥ हा तंव मायावी मृग पूर्ण । अलक्ष योजिलें विंदान[2] । धांवण्या आणोनि लक्ष्मण । सीताहरण साधावें ॥९०॥ ऐसें राक्षसीमायामत । आपण जाणोनि समस्त । विलंब करों नये येथ । त्वरित रघुनाथ रिघो पाहे ॥९१॥

**त्यामुळे लक्ष्मण आश्रम सोडून येण्यापूर्वीच सत्वर परतणे :** जंव आला नाही लक्ष्मण। तंव तेथे जावें आपण । विलंब करितांचि जाण । सीता रावण हरील ॥९२॥ लक्ष्मण धांवण्या नये उठाउठीं । तंव ठाकावी[3] पंचवटी । ऐसें विचारोनि पोटीं । मग जगजेठी निघों पाहे ॥९३॥ एका जनार्दना शरण । श्रीराम मारीच मारिला पूर्ण । धांवण्या धांवेल लक्ष्मण । कथाविंदान अवधारा ॥९४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडें एकाकारटीकायां मारीचकपटमृगवधो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥१४॥ ॥ओव्या॥९४॥ श्लोक ॥११॥ एवं ॥१०५॥

## अध्याय पंधरावा

### लक्ष्मणाचे सांत्वन

**श्रीरामांची हाक ऐकून सीता घाबरते :** श्रीरामचंद्राय नमः । श्रीरामस्वरासमान । मारीचानें केलें आक्रंदन । ऐकोनि सीता करी रुदन । श्रीराम आपण सांपडला ॥१॥ राम रणरंगधीर संपूर्ण । विकट योद्धा अति दारुण । तरी तो आक्रंदे दीनवदन । पाव लक्ष्मणा म्हणोनि ॥२॥ श्रीरामाचें आक्रंदन । ऐकोनियां दीनवदन । उगाचि राहिला लक्ष्मण । याचें का मन द्रवेना ॥३॥

अतृस्वरं तु तुं भर्तुर्विज्ञाय सदृशं वने । उवाच लक्ष्मणं सीता गच्छ जानीहि राघवम् ॥१॥
सखायं भ्रातरं ज्येष्ठं रामं पंथानमागतम् । आक्रंदमानं तु वने भ्रातरं त्रातुमर्हसि ॥२॥
तं क्षिप्रमभिधावं त्वं भ्रातरं शरणैषिणम् । रक्षसां वशमापन्नं सिंहानामिव गोवृषम् ॥३॥

**परंतु लक्ष्मण मात्र स्वस्थचित्त असलेला पाहून सीतेला खेद व चिंता :** सीता म्हणे लक्ष्मणासी । आजि कां निष्ठुर झालासी । राक्षसीं रोधिलें रामासी । तूं कां न धांवसी धांवण्या ॥४॥ तूं जिवलग बंधु सखा । रणांगणींचा पाठिराखा । ऐकोनि श्रीरामाच्या हाका । धांवण्यां तूं कां न धांवसी ॥५॥ जैसा व्याधिग्रस्त केसरीं[5] । वनीं वेढिजे वानरीं । श्रीराम तैसा वनांतरी । निशाचरीं वेढिला ॥६॥ श्रीराम रणरंगधीर पूर्ण । तोही आक्रंदें आला शरण । शरणागताचें रक्षण । केंवी आपण न करिसी ॥७॥ ऐसें बोलोनियां सीता । लक्ष्मणचरणीं ठेवी माथा । श्रीराम पावला अति आकांता । धांवणें तत्वता करीं वेगीं ॥८॥

**श्रीरामांच्या सामर्थ्याचे महिमान :** ऐकोनि सीतेचें वचन । सौमित्र घाली लोटांगण । ऐक माते सावधान । रघुनंदननिजमहिमा ॥९॥

देवि देवमनुष्येषु गंधर्वेषु पतत्रिषु । राक्षसेषु पिशाचेषु किन्नरेषु मृगेषु च ।
अशक्यस्तव वैदेहि भर्ता जेतुं न संशयः ॥४॥

सुरासुर नर किन्नर । दानव मानव निशाचर । यक्ष राक्षस विद्याधर । पळती सत्वर श्रीरामबाणें ॥१०॥ पिशाच गुह्यक गंधर्ववीर । त्रैलोक्यींचे निधडे[6] शूर । पक्षी पन्नग[7] विखार । पळती सत्वर श्रीरामबाणें ॥११॥ विरिंच्यादि[8] सुरेश्वर । कांपती देखोनि श्रीरामशर । पिनाकपाणि[9] श्रीशंकर । तोही श्रीरामासमोर होऊं न शके ॥१२॥ देखोनी श्रीरामाचा बाण । शंकर घाली लोटांगण । त्या श्रीरामासी मारील कोण । व्यर्थ रुदन कां करिसी ॥१३॥ तुज देखतां त्रिशिरा

---

शब्दार्थ - १. भयंकर, २. युक्ती, ३. गाठावी, ४. दया येत नाही. ५. सिंह, ६. दृढनिश्चयाचे, ७. सर्प, ८. ब्रह्मदेवादि, ९. पिनाकनामक धनुष्य धरणारा शंकर.

खर । मारिलें चवदा सहस्र निशाचर । त्या श्रीरामासी मृग किंकर[1] । कैंवी साचार मारवे ॥१४॥ श्रीरामबाणाच्या निजनेटें । मेरुमांदारपर्वतफुटें[2] । कळिकाळाचें पोट फाटे । घायें उतटे[3] ब्रह्मांड ॥१५॥

सीतेला लक्ष्मणाचे आश्वासन : ऐसिया श्रीरामासी देख । मृग बापुडें एकलें एक । कैंवी मारूं शकेल रंक । वृथा दुःख तूं कां करिसी ॥१६॥ श्रीराम वध्य नव्हे कोणासी । श्रीराम वधील सर्वांसी । तूं कां रडसी आक्रंदेंसी । मृत्यु श्रीरामासी असेना ॥१७॥ वसिष्ठें सांगितलें निजवर्म । अजरामर श्रीराम परब्रह्म । हें नाठविसी तूं मूर्ख परम । रुदनधर्म तो मिथ्या ॥१८॥ लक्ष्मणा धांव धांव सत्वर । हां तंव नव्हे श्रीरामस्वर । राक्षस वदती मावकर[4] । ते तूं साचार मानिसी ॥१९॥ ऐक आतां माझें उत्तर । मृग मारोनियां सत्वर । आतांचि येईल तुझा भर्तार । धरीं धीर जानकिये ॥२०॥

श्रीरामांनी जातेवेळी दिलेल्या आज्ञेचे लक्ष्मण स्मरण देतो : राक्षसांचिये छळणवचनीं[5] । तुज एकलें सांडोनि वनीं । न वचें श्रीरामाच्या धांवणीं । सत्य वाणी हे माझी ॥२१॥ श्रीराम सांगे वारंवार । जीवावरी आलिया दुर्धर । तरी न सांडावी सीता सुंदर । तुजसमोर नेमिलें ॥२२॥ माझेंविशींची कांहीं चिंता । लक्ष्मणा तुम्हीं न करावी सर्वथा । श्रीराम बोलिला तुजदेखतां । अति सावध सीता रक्षावी ॥२३॥ पुनःपुनः सांगे कानीं । राक्षस मायावी ये वनीं । सीता नेतील छळोनी । सावधानीं राखावी ॥२४॥ छळावया वनांतरी । जाली शूर्पणखा अति सुंदरी । राक्षस येतील तैसियेपरी । सीता तिळभरी न विसंबें ॥२५॥ श्रीरामाची शिकवण ऐसी । आणिक मी कैंवी करूं तुझ्या बोलासी । तुज सांडोनि वनवासीं । रामापासीं न वचें मी ॥२६॥ उल्लंघोनि श्रीरामवचन । तुझेनि बोलें जाता आपण । राक्षसीं केलिया तुझे हरण । रोकडें मरण मज आलें ॥२७॥

आत्मबुद्धिर्हितार्थाय गुरबुद्धिर्विशेषतः । परबुद्धिर्विनाशाय स्त्रीबुद्धिः प्रलयं गतः ॥५॥

सर्व अनर्थाचे मूळ कारण स्त्रीबुद्धी : निजात्मबुद्धि ते हितासी । सद्गुरुबुद्धि सुखैकराशी । परबुद्धि ते विनाशासी । मूळ प्रळयासी स्त्रीबुद्धि ॥२८॥ ऐकतां स्त्रीवचन जमदग्नी । तो निमाला तत्क्षणीं । रेणका घायवटें[6] पडे धरणीं । क्षत्रियां रणीं निर्दाळिलें ॥२९॥ तीन[7] सप्तकें[7] वधिले क्षत्री[8] । रुधिरपूर वाहे धरित्रीं । स्त्रीवाक्याची हे थोरी । जे चराचरीं आकांत ॥३०॥ ऐसी स्त्रीवाक्याची परी । हितोपदेशीं अनर्थ करी । तुज साडोनि गुंफेमाझारी । तळभरी दुरी मी न वचें ॥३१॥ अति कठिण माझा भावो । मज नाहीं श्रीरामस्नेहो । तुज एकलें सांडोनि पहा हो । शोधूं श्रीरामरावो न वचें मी ॥३२॥ मज काढावया गुंफेबाहेरी । धांव धांव म्हणिजे निशाचरीं[9] । ऐसी मायिक हाक मारी । तुजहूनि दूरी मी न वचे ॥३३॥

सीतेचा संताप व लक्ष्मणाला अभिशाप : ऐसें बोलतां लक्ष्मणा । सीतेसी कोप आला चौगुणा[10] । सांडोनि मर्यादेची[11] गणना । कठिण वचना अनुवादे[12] ॥३४॥

नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत् । त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिशु ॥६॥

प्रत्यक्ष श्रीरामाची हांक । तें म्हणसी तूं नायिक । माझे ठायीं तुझा अभिलाष । पापी निष्टंक तूं एक ॥३५॥ माझा अभिलाष धरोनि मनीं । वनासी आलासी सेवक होऊनि । श्रीराम राक्षसी वधिल्या वनीं । मज निजपत्नीं करूं पाहसी ॥३६॥

शब्दार्थ - १. कःपदार्थ, २. मेरू व मांदार यासारखे पर्वत, ३. फाटे, ४. मायावी, कपटी, ५. मायावी शब्दाने, ६. घायाने, ७. एकवीस वेळा, ८. छत्रिय, ९. राक्षसांनी, १०. चौपट, ११. स्त्रियांच्या, १२. बोलू लागली.

सापत्नांची हेचि बुद्धि । बंधूंसी बंधु छळोनि वधी । त्याची भोगावीं भोगसमृद्धी । हे दुष्टबुद्धि तुजपासीं ॥३७॥ संवचोराचें[1] सांजणें[2]। तैसी सेवा केली लक्ष्मणें । नाना युक्तीं श्रीराम मारवणें । मज आपण भोगावया ॥३८॥ श्रीरामसेवा केली प्रबळ । त्या सेवेचें हेंचि फळ । पत्नी करावी जनकबाळ । सेवा सफळ येणें तुझी ॥३९॥ परदारकामिक[3] दुष्ट । सेवा करोनि अति शठ[4] । आजि कळला भाव स्पष्ट । महानष्ट तूं पापी ॥४०॥ श्रीराम सन्निध देखोनी । म्हणसी जानकी माझी जननी । श्रीराम राक्षसीं वधिलिया वनीं । सीता पत्नी करूं पाहसी ॥४१॥ मी तंव श्रीरामाचें रंक । परपुरुषाचें न शिवें अंक[5] । जळो तुझें काळें मुख । माझा अभिलाष करूं पाहसी ॥४२॥ तूं तंव माझा अभिलाषी । मजपासोनि दुरी न वचसी[6] । मीच जाईन श्रीरामापासीं । काय त्यासी वर्तलें ॥४३॥

अश्रुपूर्णमुखी सीता तथोक्त्वा पुनरब्रवित् । गोदावरीं प्रवेक्ष्यामि हीना रामेण लक्ष्मण ॥७॥
पिबामि वा विषं तीक्ष्ण प्रवेक्ष्यामि हुताशनम् । न त्वहं राघवादन्यं कदापि पुरुषं स्पृशे ॥८॥

आत्मघात करण्याची सीतेची धमकी : लक्ष्मणा ऐकें सावधान । श्रीरामवेगळीं मी आपण । होईन गंगेमाजी मग्न । कीं हुताशन[7] प्रवेशें ॥४४॥ किंवा करीन विषभक्षण । अथवा पर्वतपतन[8] । अथवा वृक्षाग्रीं वेंघोन । देईन प्राण अध:पतनें । अथवा वृक्षाग्रीं वेंघोन[9] । देईन प्राण अध:पतनें ॥४५॥ परी तुजसीं अंगसंग[10] । नाहीं करणें विषयभोग । बोलणें हेंचि माझें निर्व्यंग[10] । तूं नि:संग विषयार्थी ॥४६॥ श्रीरामावेगळें आणिकातें । नाहीं स्पर्शणें जीतें । ऐसे जाणोनि निश्चितें । भजें भावार्थे श्रीरामा ॥४७॥ ऐकोनि सीतेची दुष्ट वाणी । सौमित्र बोटे घाली कानीं । श्रीरामनाम स्वयें स्मरोनी । अति उद्विग्न संतप्त ॥४८॥

लक्ष्मणाचा मन:क्षोभ, सीतेला रामाज्ञेची स्पष्ट जाणीव : जानकीचे वर्मी वाग्बाण । साहों न शकेचि लख्मण । दृढ खोचलें अंत:करण । वचनें प्राण सोडूं पाहे ॥४९॥ ऐसें बोलोनि अति कठिण । सीता आक्रोशें करी रुदन । तें देखोनि लक्ष्मण । बोलें दारुण क्षोभोनी ॥५०॥

स्वभावोऽयं हि नारीणां त्रिपु लोकेषु कथ्यते । विमुक्तधर्माश्चपलास्तीक्ष्णा भेदकरा: स्त्रिय: ॥९॥
उपशृण्वंतु मे सर्वे साक्षिभूता वनेचरा: । न्यायवादी यथावाक्यमुक्तोऽहं परुषं त्वया ॥१०॥
स्त्रीस्वभावेन दुष्टेन दुरुक्तेन न्यवस्थितम् । यास्यामि यत्र काकुत्स्थ: स्वस्ति तेऽस्तु वरानने ॥११॥

स्त्रीस्वभाव दुष्ट अद्‌भुत । जे नवमास वाहे उदरांत । जे सोसी सदा नरक मूत । त्या मातेसी सुत पारखा करी ॥५१॥ बंधुबंधूंसीं वैराकार[11] । वाढवावया मुख्य साचार । स्त्रीसंगाचा बडिवार । वेगळाचार सुहृदांसीं ॥५२॥ मी बोलें नित्य नित्य निष्पाप । तो त्वां छळोनि श्रीरामप्रताप । मजवरी घालिसी अभिशाप[12]। हें महापाप जानकिये ॥५३॥ सांडोनि मर्यादा धर्मार्गळा । स्त्रिया होती उत्सृंखळा । तें म्यां आजी देखिलें डोळां । जनकबाळाअभिशापें ॥५४॥ मज तुज साक्ष येथें । ऐकताती समस्त भूतें । उल्लंघावया श्रीरामाज्ञेतें । अभिशापोक्तें भज छळिलें ॥५५॥ तुज सांडोनि वनांतरी । तिळभरी म्यां न व्हावें दूरी । हे श्रीरामाज्ञा वंदितां शिरीं । नानापरीं त्वां छळिलें मातें ॥५६॥ त्वां मज घातला अभिशाप । तुझें तुज फळेल पाप । श्रीराम न भेटे सद्रूप । भोगिसी संताप षण्मास ॥५७॥ तूं जननी मी अपत्य । हा तंव माझा दृढ भावार्थ । तुझा तुज फळेल वचनार्थ । अति अनर्थ पावसी ॥५८॥

लक्ष्मणाच्या शपथा व निरूपायानें जाणें : मी अपत्य तूं जननी । हा सद्भाव माझे मनीं । तरी राम भेटे मृग वधोनी । द्वंद्वबंधनीं[1] निर्मुक्त ॥५९॥ श्रीरामाज्ञेचें रक्षण । तुजपासीं होतो जाण ।

---

शब्दार्थ - १. विश्वासघातक्याचे, २. सोबत, ३. परस्त्रीची इच्छा करणारा, ४. वंचक, ५. मांडी, ६. जात नाहीस, ७. अग्नी, ८. पर्वतावरून कडेलोट, ९. चढून, १०, ज्यात काही उणे नाही असे परिपूर्ण, ११. द्वेष, १२. निंदा, तळतळाट, १३. धर्मरूप मर्यादा.

म्यां केलिया वनाभिगमन । राक्षस हरण तुज करिती ॥६०॥ पुढें श्रीरामाची दृष्टादृष्टी । सहसा तुजसी न होईल भेटी । सोशिल्या विघ्नांचिया कोटी । श्रीराम दृष्टीं देखसी तूं ॥६१॥ तुज सांडोनि निर्बंधन[२]। माझेनि न करवेचि गमन । माझें निजसत्व[३] संपूर्ण । संरक्षण तुज असो ॥६२॥

आश्रमातून जाताना रेषाबंधन व ती रेषा न ओलांडण्याचा सीतेला दंडक : तूं न मानसी माझा भावो । मज पुसेल श्रीरामरावो । त्यालागीं रक्षणनिर्वाहो। करोनि पाहो मी जातों ॥६३॥ श्रीरामाचा निजसखा[४] । निर्विकल्प शुद्ध नेटका । तरी हे माझी मर्यादा देखा । ब्रह्मादिकां अनुल्लंघ्य ॥६४॥ माझे मर्यादेची रेखा । कळिकाळासी अटक देखा । तेथें राक्षसां पैं रंकां । केंवी आवांका[५] करवेल ॥६५॥ राक्षसां न करवे हरण । ऐसें ठेविलें निजरक्षण । तुवां पाळावें येवढें वचन । रेखाउल्लंघन न करावें ॥६६॥ योगी संन्यासी तापसवेषी । भिक्षेसी येतील आश्रमासी । तूं विश्वासूं नको तयांसीं । मर्यादेसी नुल्लंघीं ॥६७॥ उल्लंघोनियां रेखेसी । जरी तूं भिक्षा देऊं जासी । तरी तूं राक्षसीं हरिजेसी । दुःखी होसी जानकिये ॥६७॥ ऐसें सांगोनि लक्ष्मण । करावया श्रीरामगवेषण[६] । सवेग निघाला आपण । धनुष्यबाण सज्जोनी ॥६९॥

त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराजलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा सदगादरण्यम् ।
मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वंदे महापुरुष ते चरणारविंदम् ॥१२॥

श्रीराम व लक्ष्मण यांची भेट : देव वांछिती राज्यवैभव । पितृवाक्यें त्यजोनि सर्व । चरणचालीं श्रीराघव । आला स्वयमेव वनवासा ॥७०॥ सीताप्रियेचें प्रियचवन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । मायामृगीं करी धांवन । ते श्रीरामचरण वंदी सौमित्र ॥७१॥ ध्वजवज्रांकुशरेखा। श्रीरामपदें पाहत देखा । चालिला लक्ष्मण निजसखा । स्वानंदें देखा डुल्लत ॥७२॥ श्रीरामपदीं प्रेमपूर्ण । पद दों पदीं लोटांगण। । श्रीरामचरण लागल्या जाण । धन्य प्राण पैं माझा ॥७३॥ श्रीरामचरण लागल्या जाण । तृण[७] पर्ण मुत्तिका पाषाण । मस्तकीं वंदी तो रजःकण । धन्य चरण रामाचे ॥७४॥ श्रीरामपदें देखतां दृष्टीं । सौमित्रासी आनंदकोटी । गातां नाचत चालतां दृष्टीं । तंव श्रीराम जगजेठी देखिला ॥७५॥ मृग मारोनि गंगातटीं । अश्वत्थतरूच्या तळवटीं । स्वस्थ बैसला श्रीराम जगजेठी । तंव देखिला दृष्टीं सौमित्रें ॥७६॥ कुमित्रा[८] गेल्या कल्पकोटी । श्रीरामासीं नव्हेचि भेटी । तो सौमित्रें देखिला दृष्टीं । स्वानंदपुष्टी सदोदित ॥७७॥ नाहीं श्रीरामीं युद्धकंदन । नाही राक्षस ना बंधन । नित्यमुक्त श्रीरघुनंदन । सुखसंपन्न देखिला ॥७८॥ लक्ष्मणा धांव धांव सत्वर । हें तंव मायिक उत्तर । सौमित्रें जाणोनि सत्वर । श्रीरघुवीर वंदिला ॥७९॥ दोघां जाली दृष्टादृष्टी । आनदें ओसंडली[९] सृष्टी चरण । वंदोनियां उल्हाटीं । पडली मिठी आलिंगनीं ॥८०॥ दोनी दीपक एक होती । दोहींची मिळोनि एक दीप्ती । श्रीरामसौमित्र तैसिया रीतीं । क्षेम देती एकत्वें ॥८१॥ समुद्रीं रिघतांचि लवण । स्वयें समुद्र होय आपण । तेंवी श्रीरामलक्ष्मण । जालें परिपूर्ण पूर्णत्वें ॥८२॥ श्रीरामा नाठवे रामपण । येरा नाठवे भक्तपण । खुंटले बोल तुटलें मौन । आनंदीं निमग्न सदोदित ॥८३॥ सीतें छळिलें अभिशाप-वृष्टीं । ते नाठवे लक्ष्मणा गोष्टी । आणि ठाकोनि जावें पंचवटी । हेंही श्रीरामपोटी नाठवे ॥८४॥ ऐसे स्वानंदाचे पोटीं । दोघां पडली एक मिठी । संरक्षावया

---

शब्दार्थ – १. शीतोष्ण, सुखदुःखादि विकाररहित, २. रक्षणरहित, मोकळी, ३. शुद्धभाव, ४. अत्यंत प्रिय, ५. धीर, धैर्य, ६. श्रीरामाचा शोध, ७. गवत, पाने आणि माती, ८. रामाशी विरोध करणाऱ्याला, ९. भरली.

सृष्टी । सुटली मिठी प्रेमाची ॥८५॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । एकले सांडोनि सीतेसी । तूं कां येथें धांवलासी । तें मजपाशीं सांग वेगें ॥८६॥

ततो लक्ष्मणमायातं ददर्श विगतप्रभम् । विषण्णः सविषण्णेन दुःखितो दुःखभागिना ॥१३॥

**सीतेच्या रक्षणाविषयी विचारल्यावर लक्ष्मण गहिवरतो :** पुसतां सीतेचें रक्षण । निवांत जाला लक्ष्मण । दुःखे दुःखी अति दारुण । अश्रुपूर्ण मुख दिसे ॥८७॥ पुसों जातां सीतेची गोष्टी । लक्ष्मणासी दुःखकोटी । देखोनियां मुखसान्निष्टीं[1] । श्रीराम पोटीं धाकिन्नला ॥८८॥ स्वयें सीतेनें सौमित्रासी । दुष्ट दुरुक्तीं अति संत्रासीं । धांवण्या धाडिला मजपासीं । अति दुःखेंसी दुःखित ॥८९॥ सौमित्र नुल्लंघी माझे वचना । परी वर्मस्पर्शाची संज्ञा । सीतेनें करविली आज्ञा । श्रीरामें सर्वज्ञा कळों सरलें ॥९०॥

**स्त्रीवाक्याच्या कठोरपणामुळे सीतेला एकाकी सोडणे भाग पडले :** स्त्रीवाक्याचे दारुण बाण । हृदयीं खोचलें संपूर्ण । तेणें अति दुःखी लक्ष्मण । आला धांवोन मजपासीं ॥९१॥ सीता सांडोनि कां आलासी । ऐसें पुसतां लक्ष्मणासी । लक्ष्मण लागला पायांसी । उकसाबुकसीं स्फुंदत ॥९२॥ आलिया विघ्नांच्या कोटी । परी मी न सांडितों पंचवटी । परि सीता-भिशापगोष्टी[2] । ऐकून उठाउठीं मी पळालों ॥९३॥ ऐसें बोलली दारुण । जेणें तत्काळ ये मरण । करितां तुझें नामस्मरण । माझे प्राण वांचले ॥९४॥ जरी न करितों तुझें नामस्मरण । तरी तात्काळ मज येते मरण । देखोनियां तुझे चरण । सावधान पावलों ॥९५॥

**वृत्तांत निवेदन : सीतेच्या मर्मभेदक बोलण्याचा परिणाम :** जानकीअनुवादकथक । ऐकें[3] स्वामी सावधान । जे जे विंधले वाग्बाण । तें ते प्रकरण अवधारीं ॥९५॥ लक्ष्मणा धांव धांव ऐसे गर्जन । मायामारीचाक्रंदन । ऐकोनि सीता करी रुदन । युद्धबंधन श्रीरामा ॥९७॥ जानकी म्हणे धावं सत्वर । राक्षसीं वेढिला रघुवीर । त्याचा करीं रणोद्धार । तूं सहोदर पाठिराखा ॥९८॥ म्यां दिधलें प्रतिवचन । राक्षस बापुडें मशक कोण । त्यासी नाटोपे रघुनंदन । ऐकें महिमान रामाचें ॥९९॥ मिळाल्या दैत्यदानवांच्या थाटी । आलिया राक्षस कोट्यनुकोटी । श्रीराम नाटोपे जगजेठी । नळी[4] निवटी बाणें एकें ॥१००॥ सीता न मानी तुझा प्रताप । अति आक्रंदें करी संताप । धांवण्या धांव सकृप । राम सद्रूप पाहत दृष्टीं ॥१॥ श्रीरामाज्ञा माझे शिरीं । तुजपासोनि तिळभरी । परता नव्हें धांवण्या बाहेरी । निजनिर्धारी बोलिलों ॥२॥ तुज सांडोनि एकली नारी । मज जातां धांवण्यावारी । तुज हरिल्या निशाचरीं । तिघांचें शिरीं दुर्नाम ॥३॥ श्रीराम सांगे आळवूनी[6] । सीता राखावी सावधानीं । तो मी धांवण्या न धावें वनीं । तुजपासोनी दुरी न वचें ॥४॥ ऐसा ऐकोनि माझी वाणी । सीता क्षोभली शतगुणीं । पूर्वमर्यादा सांडोनी । वर्मी खोंचोनी अनुवादे[7] ॥५॥ श्रीराम धांवण्या न धांवोनी । दुरी नव्हेसी मजपासोनी। राम राक्षसीं वधिल्या वनीं । मज निजपत्नी करूं पाहसी ॥६॥ माझा अभिलाष धरोनि मनीं । सेवा करिसी संवचोरपणीं[8] । श्रीराम राक्षसीं वधिल्या वनीं । मज निजपत्नी करूं पाहसी ॥७॥ परदारिया अति लंपटा । सेवकवर्गामाजी महानष्टा । मुख न दावीं मज पापिष्ठा । दुष्टा भ्रष्टा चांडाळा ॥८॥ होवोनि श्रीरामाचा सवता[9] । वना आलासी मजभोवतां। येणें वाक्यें सांडोनि सीता । आलों रघुनाथा तुजपासीं ॥९॥ महामारक जें कां विख । तें मज घेतां निजपीयूख[10] । परी सीतावाक्याचें असुख । परम दुःख श्रीरामा ॥११०॥ पित्यानें

---

शब्दार्थ - १. उद्विग्न मुखाकडे, २. सीतेने केलेला आरोप, ३. जानकीचे बोलणे ऐक, ४. उत्तर, ५. मान, गळा, ६. बजावून, ७. बोलूं लागली, ८. विश्वासघातक्याप्रमाणे, ९. शत्रू, १०. अमृतासमान.

गांजिल्या शांतवी माता । मातेनें गांजिल्या शांतवी पिता । येणेंचि भावें श्रीरघुनाथा । आलों तत्वतां मी तुजपासीं ॥११॥

श्रीरामाचे लक्ष्मणाला आलिंगन : ऐकोनि सौमित्राचें वचन । श्रीरामें दिधलें आलिंगन । तेणें जालें समाधान । सुखसंपन्न तेणें दोघे ॥१२॥ साकर विरोनि होय जीवन । जीवना आलें गोडपण । तेंवी दोघे रामलक्ष्मण । सुखसंपन्न येरयेर ॥१३॥ लोह परिसासीं पडतां गांठी । तत्काळ काळिमेसी होय तुटी । तेंवी सौमित्रेंसीं श्रीरामभेटी । दुःखकोटी निमाल्या ॥१४॥

श्रीरामांना खऱ्या रहस्याची कल्पना असल्यामुळे सीतेच्या वर्तनाची त्यांना जाणीव होती : ऐकोनि सीतेचें वचन । विस्मित श्रीरामाचें मन । मायामृगाचें विंदान[1] । जाणे संपूर्ण श्रीराम ॥१५॥ मायामृगें आक्रंदोन । धांवण्या आणिला लक्ष्मण । मागें येवोनि रावण । सीताहरण करील ॥१६॥ ऐसा जाला कृतकार्यार्थ । जाणोनियां श्रीरघुनाथ । सुख मानिलें पोटांत । राक्षस अंत करावया ॥१७॥ जाणोनि मायामृगाची गोष्टी । बाइलेचिया बोलासाठीं । राम कां धांवला मृगापाठीं । श्रोतीं पोटी न मानावें ॥१८॥ स्त्रीकामाच्या अति प्रीतीं । मायामृगीं श्रीरघुपती । नाहीं धांवला कामासक्तीं । गूढ ग्रंथोक्तीं अवधारा ॥१९॥ सीता केवळ नव्हे पत्नी । परमभक्तशिरोमणी । चरणचालीं आली वनीं । सेवेलागोनी श्रीरामा ॥१२०॥ राज्यीं असतां श्रीरामासीं । सेवा वांटली सेवकांसी । स्वयें करावया सेवेसी । उल्हासेंसी वना आली ॥२१॥ सीता निर्विकार भक्त । श्रीराम जाणे मनोगत । तिचा पुरवावया भावार्थ । स्वयें धांवत मृगामागें ॥२२॥ भक्ताचिया वचनासाठीं । प्रकटला कोरडे काष्ठीं[2]। तो श्रीराम धावे मृगापाठीं । सुखसंतुष्टी सीतेच्या ॥२३॥ भक्ताचें भावें वचन । कदा नुल्लंघी श्रीरघुनंदन । सीतासद्भावें आपण । करी धांवणें मृगापाठीं ॥२४॥ जैसा भाव तैसा देव । यदर्थीं नाहीं संदेह । देखोनि सीतेचा निजसद्भाव । धांवे श्रीरामराव मृगापाठीं ॥२५॥ मायामृगीं करी धांवन । समूळ सांगितलें आपण । सीता निर्भर्त्सी लक्ष्मण । तेंही निरूपण अवधारा ॥२६॥ त्रैलोक्यपावन श्रीरामख्याती । वाढवावया अगाध कीर्ती । लक्ष्मणा दवडी सीता सतीं । नाना वक्रोक्तीं[3] छळोनी ॥२७॥ मुख्य सीतेचें मनोगत । श्रीरामें वधावा लंकानाथ । तेचि साधावया कार्यार्थ । केला छळणार्थ सौमित्रा ॥२८॥ श्रीराम सीता सौमित्र । तिन्हीं मूर्ती अति पवित्र । प्रकटावया श्रीरामचरित्र । कथाविचित्रअनुवादु ॥२९॥ अवताराचें नटनाट्य[4] । प्रगट करावया स्पष्ट । कथानुवाद दिसे बिकट । तोचि निर्दिष्ट परमार्थ ॥१३०॥ सीता सती स्वयें सद्रूप । ते लक्ष्मणा लावी अभिशाप । हे मूर्खांचे मूर्ख जल्प । कथानुरूप[5] अति गूढ ॥३१॥ येरयेरांचें मनोगत । जाणोनियां स्वये वर्तत । अगाधकीर्ति श्रीरघुनाथ । जग पुनीत श्रीरामनामें ॥३२॥ श्रीरामकथेचें अक्षर । क्षराक्षरातीत पर । श्रोते वक्ते अति पवित्र । कथाचरित्रअनुवादू ॥३३॥ केवळ जपतां श्रीरामनाम । नामें वक्ता होय परब्रह्म । त्याचा चरित्रसंभ्रम । आनंद परम परमार्थीं ॥३४॥ एकाजनार्दना शरण । भेटेल श्रीराम लक्ष्मण । येरीकडे सीताहरण । स्वयें रावण करूं पाहे ॥३५॥ सीता साधावया[6] पंचवटीं । रावण येवोनियां कपटी । त्या दोघांच्यां धर्मगोष्टी । कथाकसवटी[7] अनुपम्य ॥१३६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां श्रीरामलक्ष्मणानुवादो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥ ओंव्या ॥१३६॥ श्लोक ॥१२॥ एवं ॥१४८॥

---

शब्दार्थ – १. कपट, कौतुक, २. नृसिंहअवतार, ३. दुष्ट शब्द बोलून, ४. अवतारकृत्य, ५. कथेतील माला अनुसरून, ६. केवळ, ७. तृप्त झाले.

# अध्याय सोळावा

## सीताहरण

लक्ष्मण आश्रमातून गेल्यावर भिक्षेकऱ्याच्या वेषात रावणाचे आगमन : श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः । लक्ष्मण गेला रामापासीं । सीता एकली गुंफेसीं । रावण आला तेचि संधीसीं । सीतेपासीं भिक्षुवेषें[1] ॥१॥

एतदंतरमासाद्य दशग्रीवः प्रतापवान् । परिव्राजकरूपेण वैदेहिमन्ववर्तत ॥१॥

गुंफे नसतां श्रीरामलक्ष्मण । शून्य मंदिरी रिघे श्वान । तेंवी आला दशानन । सीताहरणकार्यार्थी ॥२॥ गर्भजन्में जन्मली नाहीं । सीता देहींच विदेही । तिचे हरण करावया पाहीं । आला लवलाहीं लंकानाथ ॥३॥ सीताहरण करूं म्हणतां । मुळींच भीक लागली लंकानाथा । चौपालवी[2] आली हाता । अंगीं अशुभता बाणली ॥४॥ चौदा चौकड्यांचें राज्यलक्ष्मण । ते गेलें न लागतां क्षण । भिकारी जाला आपण । सीताहरण करूं म्हणता ॥५॥ सीतेचा आश्रम देखतां । भेणें पळाली राजवैभवता । भिक्षेनें वरिलें लंकानाथा । ऐसें सामर्थ्य सीतेचें दुर्धर ॥६॥ अभिलाषितां लाविली भीक । लंकेस सीता नेलिया हे देख । राक्षस मारवील एकाएक । लंका निःशेख जाळील ॥७॥ वळचणीमाजी दीपकळी । ठेवितां ते तत्काळ जाळी । तेंवी राक्षसकुळीं । करील होळी क्षणामध्यें ॥८॥ अभिलाषितां कामधेनु । निर्दाळिला सहस्रार्जुनु । तेंवी सीताहरणें रावणु । कुळनिर्दळणु राक्षसां ॥९॥

सीतेला पाहून रावणाची झालेली अवस्था : सीता पाहूं जातां जाण । पळाली त्याची आंगवण[3] । भिक्षुरूप[4] अति हीन । दीनवदन भिक्षार्थी ॥१०॥ स्वयंवरी सीता देखतां जाण । रावणा जाहला अति अपमान । येथेंही सीता पाहतां पूर्ण । निजापमान भिक्षुकत्वें ॥११॥ बाप सीतेचें विंदान[5] । दृष्टीनें गांजिला रावण । आपणियां आपण दे अपमान । दीनवदन भिक्षार्थी ॥१२॥ रावणा सन्निपात सीतेचा संपूर्ण । न कळे शुभाशुभ चिन्ह । भिक्षुवेषें अत्यंत हीन । दीनवदन भिक्षार्थी ॥१३॥ षण्मासिक सन्निपात । रावणासी जाला येथ । सीताभिलाषीं निश्चित । निजात्मघात सकुळेंसीं ॥१४॥ ऐसिया युक्तीं रावण । धरोनि भिक्षुत्व संपूर्ण । करोनि नारायणस्मरण । आला आपण आश्रमा ॥१५॥ सीता देखतां गोरटी । रावणाची खुंटली दृष्टी । पूर्ण अभिलाष जाला पोटीं । अति गोमटी रामकांता ॥१६॥ स्वरूपरूपें अति सगुण । रूपरेखा गुणलावण्य । सर्व अवयव सुखैकघन । सुखनिधान जानकी ॥१७॥ केवळ लावण्याची पुतळी । निखळ[6] सौंदर्याची ओतिली । बरवेपणासी चढली । सीता शोभली सुखरूप ॥१८॥ सीतासौंदर्यें निवाले[7] नयन । विसरला भूक तहान । देखोनि सुखावलें निजमन । नवनिधान जानकी ॥१९॥ सीतेसी होतां दृष्टीभेटी । भेटीसवें आनंदकोटी । इचेनि योगें सुखसंतुष्टी । आनंद सृष्टीं असेना ॥२०॥ ऐसिया सौंदर्याची बोली । कदाकाळीं नाहीं ऐकिली । सीता घवघवीत देखिली । भुली पडली इंद्रियां ॥२१॥

नैव देवी न गंधर्वी नासुरी न च किन्नरी । एवं रूपा मया नारी दृष्टरूपा महीतले ॥२॥

देवदानवगंधर्वादि स्त्रियांत तिच्या तुलनेची कोणीही नाही : देवी गंधर्वी सुरेश्वरी । त्याही न पावती इची सरी[8] । रंभा उर्वशी किन्नरी । इच्या नखाग्रीं न सरती ॥२२॥ दैत्यदारा आणि दानवी । सरी न पावती मानवी । सावित्री न पवे इची पदवी । सर्वावयवीं सुखरूप ॥२३॥ पद्मिनी नारी अति विख्याता । सरी न पवती वनदेवता । उमा रमा हरिहरकांता । इची स्वरूपता

---

शब्दार्थ - १. संन्याशाच्या रूपाने, २. झोळी, ३. श्रीमंतीची शोभा, ४. संन्याशाचे रूप, ५. करणी, कौतुक, ६. केवळ, ७. तृप्त झाले, ८. बरोबरी.

त्यां नाहीं ॥२४॥ मंदोदरी येथें कायसी । जेंवी खद्योत सूर्यापासीं । सीता लावण्याची राशी । सीमा रूपासीं न करवे ॥२५॥ अमृतप्रय इची बोली । ऐकतां पीयूषा[१] पडली भुली । परमहंस नये चाली । वेडावली मनोबुद्धि ॥२६॥ अंगीं खुपती चंद्रकिरण[२] । सुखैकघन सुकुमार । अकार उकार निर्विकार । मनोहर जानकी ॥२७॥ आणिक स्त्रिया मनोहर । कवि वर्णिती स्तुतिमात्र । परी सीता मनोहर साचार । मज किंकर[३] इये केलें ॥२८॥ मज हिंडता सकळ सृष्टीं । ऐसी देखिली नाहीं दृष्टीं । इसी झालिया भोगभेटी । सुखसंतुष्टी स्वानंदें ॥२९॥ सीतासुखभोगसंतुष्टी । यासी काटाळें[४] ना सृष्टीं । भाग्य असलिया ललाटीं । सीता गोरटी तैं लाभे ॥३०॥ जरी स्वयंवरीं धनुष्य उचलतें । तरी तैंच सीता वरिती मातें । धनुष्य भोवलें मजभोवतें । सामर्थ्य तेथे न चलेचि ॥३१॥ आतां ही आहे अति सांकडीं । सीता एकली वनीं निर्वडी[५] । श्रीरामाची पडल्या उडी । माझी नरडी मुरडील ॥३२॥ सांडोनि न वचें सीतेसी । श्रीरामाचा धाक मानसीं । छळोनि हरावया सीतेसी । भिक्षुभावेंसी बोलत ॥३३॥

कासि कस्य कुतश्च त्वं किंनिमित्त च दंडकम् । एका चरसिं कल्याणि घोरराक्षससेवितम् ॥३॥
इह वासश्च कान्तारे किमर्थं ते वरानने ॥४॥

रावणाचा सीतेला प्रश्न–या भयावह अरण्यात तू एकटी कशी आलीस? रावण केवळ कपटवेषी । स्वयें होवोनि संन्यासी । येवोनियां सीतेपासीं । सद्भावेंसीं पूसत ॥३४॥ तूं तंव लावण्याची राशी । वनीं एकली कां वससी । कोणी न देखों संगतीसीं । निजवृत्तांतासी मज सांगें ॥३५॥ तूं कोण कोणाची पैं कैंची। एकाकी वस्ती कानाची । हे वृत्ति नव्हे साधुत्वाची । वस्ती वनींची अति कठीण ॥३६॥ दुस्तर वस्ती दंडकारण्यीं । राक्षस मायावी ये वनीं । स्त्रिया हरिती सिंतरोनी[६] । ब्राह्मण मारोनी भक्षिती ॥३७॥ ऐसिया कठिण वनस्थळीं । तूं तंव दिससी राजबाळी । वनीं वससी कां वेल्हाळी । हें समूळीं मज सांगें ॥३८॥

स्वयंवरापासून साद्यंत वृत्तांत सीता सांगते : ऐकोनि अतीताचें वचन। सीता सांगें निजकथन । मी तंव दशरथाची सून । कन्यारत्न जनकाचें ॥३९॥ स्वयंवरीं रावणा अपमानून । श्रीरामें हरचाप भंगून । परशुरामातें जिंकोन । पर्णन[७] केलें पैं माझें ॥४०॥ श्रीराम आणि लक्ष्मण । भरत आणि शत्रुघ्न । हे चवघे बंधु जाण । जीवप्राण येरयेरां ॥४१॥ राया दशरथानें जाण । कैकेयीभाष्यनिर्बंधन[८]। वना धाडिले श्रीरामलक्ष्मण । दंडकारण्यवनवासीं ॥४२॥ नेम मर्यादा चवदा वर्षीं । श्रीरामें वसावें वनवासीं । मजही धाडिलें वनवासासी । निजसेवेसीं श्रीरामा ॥४३॥ श्रीरामसेवेसीं सावधान । माझें करावया संरक्षण । सवें दिधला लक्ष्मण । वीर दारुण प्रतापी ॥४४॥ श्रीरामें मारिलें ताटकेसी । सुबाहु मारिला रणकर्कशी । मारीच उडविला आकाशीं । बाणार्धेसीं झडपोनी ॥४५॥ विराधें मज धरितां जाण । श्रीरामें विंधोनियां[९] बाण । एकेंचि घायें घेतला प्राण । दुष्टनिर्दळण श्रीराम ॥४६॥ विराधाऐसा महाबळी । घायें मेळविला धुळी । तेणें राक्षस कांपती चळवळीं । आर्तुबळी श्रीराम ॥४७॥ मग येवोनि गंगातटीं । आश्रम करोनि पंचवटीं । वनवासातें तो कंठी । सुखसंतुष्टीं स्वानंदें ॥४८॥ सार्धवर्षत्रयोदश[१०] । रामें क्रमिला वनवास । आतां उरले षण्मास । मग प्रवेश अयोध्ये ॥४९॥ सुवर्ण मृग वधावयासी । श्रीराम धांवला वनासी । लक्ष्मण गेला तयापासीं । तेणें मज देखसी एकली ॥५०॥

---

शब्दार्थ - १. अमृताला, २. चंद्राची किरणे, ३. सेवक दास, ४. तुलना, मोज, माप, ५. संकटात खरोखर, ६. ठकवून, फसवून, ७. पाणिग्रहण, ८. कैकेयीला दिलेल्या वचनामुळे, ९. मारून, १०. साडेतेरा वर्षे.

येथे मी एकटीच नसून माझे दोघेजण संरक्षक आहेत, ते येईपर्यंत थांबण्याची विनंती : मी एकली नव्हे जाण । मज रक्षावया दोघे जण । दुर्धर वीर श्रीरामलक्ष्मण । न लागतां क्षण येतील ॥५१॥ मृग मारोनियां जाण । आतां येतील रामलक्ष्मण । तंववरी रहावें आपण । भिक्षा पूर्ण देईल राम ॥५२॥ श्रीराम अतीतांचा[1] सेवक । तुम्हांसी देखिल्या होईल सुख । भिक्षा देईल आवश्यक । तुम्हीं नावेक[2] रहावें ॥५३॥ ऐकतां सीतेची गोष्टी । रावण थरथरां कांपे पोटीं । मागें पाहे चकितदृष्टीं । उठाउठीं पळूं पाहे ॥५४॥ करावया सीतेचें हरण । अत्यंत साक्षेपी रावण । गोड बोलाचा करी प्रश्न । विश्वास पूर्ण उपजावया ॥५५॥

इह व्यालमृगाः सिंहा वृकव्याघ्रश्च राक्षसाः । कथमस्मिन्महारण्ये न बिभेषि वरानने ॥७॥

रावणाने सीतेला निर्भय असण्याचे कारण विचारल्यावरून तिने पूर्वीची कावळ्याची कथा सांगितली: येवनीं श्वापदें दुस्तर । व्याघ्र सर्प सिंह शूरक । वृक[3] जंबुक तरस तगर । निशाचर[4] नरभक्षी[4] ॥५६॥ स्त्रिया भयभीत त्रिभुवनीं । तुज भय नुपते दुर्धर वनीं । हेंचि सांगें मज-लागोनी । तूं कैसेनि निःशंक ॥५७॥ अतीता तूं ऐकें सावधान । वनीं वसतां श्रीरघुनंदन । प्रतापतेजें अति दारुण । संरक्षण निजभक्तां ॥५८॥ हृदयीं हाणोनियां नखें । मज अभिलाषिलें काकें । रामें सोडिलें दर्भईषिके[5] । वचनें एकें माझेनि ॥५९॥ श्रीरामाची दर्भईषिका । निवारेना ब्रह्मादिकां । काक हिंडतां तिहीं लोकां । शिवादिकां दुर्धर ॥६०॥ श्रीरामईषिका देखोन । चळीं कांपत इंद्रवरुण । कळिकाळ घाली लोटांगण । यम आपण शिरीं वंदी ॥६१॥ ईषिके नाहीं निवारण । काक श्रीरामा आला शरण । मग ईषिकेनें वाम नयन फोडून । कृपेनें प्राण वाचविले ॥६२॥ तैंपासोनि श्वापद गाढें । कोणी न पाहे मजकडे । तेथें राक्षस कायसें बापुडें । मजपुढें यावया ॥६३॥ श्रीरामाची प्रतिज्ञा पूर्ण । जो जो करील सीताहरण । त्याचा घेईन मी प्राण । दुर्धर बाण सोडोनि ॥६४॥

शूर्पणखा वगैरे कपटीवेषाने आलेल्यांची रामाने बोळवण कशी केली : पक्षियावरी अति पुरुषार्थ । करोनि प्रतापी श्रीरघुनाथ । ऐसा न मानावा अर्थ । रणकंदनार्थ अवधारीं ॥६५॥ श्रीरामा नावडे कपटदृष्टी । शूर्पणखा अति खोटी । छळों आली पंचवटीं । केली नकटी सौमित्रें ॥६६॥ शूर्पणखाकैवारी जाण । मारिले त्रिशिरा खर दूषण । चवदा सहस्र राक्षणगण । रामें संपूर्ण निर्दाळिले ॥६७॥ लक्ष्मणें युद्धाआंत । अद्यापि लाविला नाहीं हात । त्याचा अनुच्छिष्ट पुरुषार्थ । इद्रंजितवधार्थ ठेविलासे ॥६८॥ मारिले त्रिशिरा खर दूषण । तैं श्रीरामेंच केला पण । मारोनि कुंभकर्ण रावण । अयोध्यागमन मग करणें ॥६९॥ ऐसा प्रतापी श्रीरघुकुळटिळक । पशुपक्षियां त्याचा धाक । त्याचेनि बळें यथासुख । वनीं निःशंक मी विचरें ॥७०॥

असे सांगून सीता बसण्यासाठी आसन देते : ऐसें सीता स्वयें बोलोन । अतिथीस घाली आसन । तंव तिसीं करावया सन्निधान । चाले आपण हरणार्थी ॥७१॥

तिला पळविण्यास लक्ष्मणरेषेची अडचण : तंव लक्ष्मणाची मर्यादारेखा । उल्लंघवेना दशमुखा । करितां बळाचा आवांका । मर्यादारेखा नुल्लंघवे ॥७२॥ रेखा रावण जंव पाहे तळीं । तंव ते खोल सप्तपाताळीं । वरती पाहतां निराळीं[7] । नभोमंडळीं जडलीसे ॥७३॥ तळींहूनि जावया नाहीं गती । उलंघावया न चले शक्ती । रेखेनें रोधिला लंकापती । सीतेप्रती न वचवे ॥७४॥ सीतेपासीं न वचवे जाण । मग कैसेनि करवेल हरण । सत्य

---

शब्दार्थ - १. याचकांचा, २. क्षणभर, ३. लांडगे, ४. माणसांना खाणारे राक्षस, ५. दर्भाची काडी, ६. सान्निध्य, ७. अंतराळी, आकाशात.

सत्वाथिला[1] लक्ष्मण । रेखारक्षण जानकिये ॥७५॥ सीता सांडोनि गेला लक्ष्मण । रेखा ठेविली दृढ रक्षण । अत्यंत कष्टतां रावण । सीताहरण न करवे ॥७६॥ मारीच निमालासे देखा । आणि माझेनि नुल्लंघवे रेखा । वेगीं आलिया रघुकुळटिळका । दाही मस्तकां छेदील ॥७७॥ ऐसिया विचाराच्या गोष्टी । उठल्या रावणाच्या पोटीं । सीता देखोनि गोरटी । उपरमदृष्टि उपजेना ॥७८॥

अत्यंत भुकेचे ढोंग करून रावण सीतेला त्या रेषेच्या बाहेर आणतो : मग मांडिलें पूर्ण कपट । संन्यासी आलिया स्त्रियांनिकट । तो जाणावा महापापिष्ठ । अति निर्दुष्ट यतिधर्मीं ॥७९॥ संन्यासधर्माचें लक्षण । निंद्य स्त्रियांचें दर्शन । निंद्य स्त्रियांसीं संभाषण । सान्निधान अतिं निंद्य ॥८०॥ श्रीराम परमार्थी नेटका । तरी कां धर्माआड ठेविली रेखा । याच विशींची आशंका । पाळें न देखा जावया ॥८१॥ या वनींचे राक्षस वासी[3] । भीत भीत आलों मी या वनीसी । तुम्हां देखोनि मनुष्यवेषीं । येथे भिक्षेसी मी आलों ॥८२॥ तूं राक्षससुंदरी मनुष्यवेषी । भीतरी नेसी मारायासी । अत्यादरें बोलाविसी । सन्मान देसी भक्षावया ॥८३॥ ऐसें ऐकोनि अतिथिउत्तर । सीता म्हणे श्रीहरहर । आम्ही नव्हों गा निशाचर । नित्य किंकर अतिथींचे ॥८४॥ मग सीता आणावया रेखेबाहेरी । रावणें बुद्धि योजिली पुरी । क्षुधेनें पीडलों हो भारी । डोळां अंधारी येतसे ॥८५॥ जरी कृपा आहे अतीतासीं । बाहेरी आणोनि भिक्षा देसी । तरी गंगातीरीं सावकाशीं । निजआहारासी करीन ॥८६॥ गोड बोलसी जैसें पीयूख[4] । परी न घालिसी ये वेळे भीक । माझेनि न साहवेचि भूक । तरी आतां विमुख मी जातों ॥८७॥ मग सीता म्हणे स्वामिनाथा । विमुख व वचाव[5] सर्वथा । रेखा उल्लंघोनि तत्वतां । भिक्षा निजस्वार्था देईन ॥८८॥ विमुख जालिया अतीत । श्रीरामसौमित्र युद्धाआंत । जयो कदा न पावत । अतित विघात हाईल ॥८९॥ सुखी केलिया अतीत । सुखी होईल श्रीभगवंत । श्रीरामलक्ष्मण युद्धाआंत । यशवंत होतील ॥९०॥ राखितां[6] लक्ष्मणमर्यादारेख[6] । अतीत होऊ पाहे विमुख । येणें पापें पावेल पति दुःख । भिक्षा आवश्यक मी घालीन ॥९१॥ ऐसा विचार मानसीं । सीतेनें करोनि निश्चयेसीं । भिक्षा आणावया अतीतासी । स्वयें गुंफेसीं रिघाली ॥९२॥

सीता भिक्षा आणण्यास आत गेली असता आश्रमात देवांचे आगमन : तंव हडबड जाली देवांसी । स्वर्गी होती कासाविसी । सकळ देव आणि ऋषी । ब्रह्मयापाशीं स्वयें आले ॥९३॥ जे सुटावी देवांची बांधवडी । आजिची आहे लग्नघडी । बुद्धि विचारावी गाढी । सुरसांकडी[7] फेडावया ॥९४॥ भिक्षा देतां रावणाप्रती । रावण सीता धरील हातीं । क्षणार्धे भस्म करील सीता सती । आदिशक्ती जगदंबा ॥९५॥ जेंवी पतंग दीपाप्रती । आलिंगितां मरोन जाती । तेंवी सीता धरिता हातीं । भस्मगति रावणा ॥९६॥ रावण जालिया भस्मीभूत । मग लंकेसी न ये रघुनाथ । देवबांधवडी[8] समस्त । इंद्रजित सोडीना ॥९७॥

सुरगणांची भीती : ऐसें विचारोनि जाण । गुंफेसी येऊनि सुरगण । धरिले सीतेचे निजचरण । भिक्षा आपण न घालावी ॥९८॥ अतीत जातां विमुख । श्रीरामलक्ष्मण पावती दुःख । तुम्ही सर्वज्ञ देवलोक । हा विवेक मज सांगा ॥९९॥ मग देव सांगती आपण । अतिथिरूपें हा रावण । तुझें करूं आला हरण । भिक्षा आपण न घालावी ॥१००॥ मग बोलिली सीता सती । रावणें मज धरितां हातीं । त्यासी लावीन कल्पांतख्याती । भय किती

---

शब्दार्थ – १. पूर्ण सत्वगुणसंपन्न, २. विवेकदृष्टी, ३. राहणारे, ४. अमृत, ५. न जावे. ६. लक्ष्मणाने सांगितल्याप्रमाणे रेखा सोडून बाहेर न गेल्याने, ७. देवांचे संकट, ८. देवांचे बंधन.

मज त्याचें ॥१॥ रावण कायसें बापुडें । दहा तोंडांचें तें किडें । त्यांचे भय मजपुढें । वाडेंकोडें[1] काय सांगा ॥२॥ तंव देव म्हणती ऐक माते । रावणबंदीं आम्ही समस्तें । तुवां निर्दळिलिया रावणातें । इंद्रजित आमुतें सोडीना ॥३॥ करावया आमुचें[2] बंधमोचन । तुम्हां दोघांचें अवतरण । तूंचि पाहें विचारून । पूर्वविधान निजयोग ॥४॥

देवांना सीतेने रहस्य सांगून समाधान केले : ऐकोनि देवांचे वचन । सीता जाली हास्यवदन । पावोनि मूळींची निजखूण । काय आपण बोलली ॥५॥ जरी मी राहिलें गुप्तस्थिती । तरी रावण आलासे भिक्षार्थी । त्यासी काय कराल युक्ती । ते मजप्रती सांगावी ॥६॥ देव बोलती निजयोग्यता । रावणाच्या भिक्षार्था । आम्हीं करूं मायिक सीता । तेणें जनकदुहित स्वयें हांसे ॥७॥ साकार आणि सचेतनता । मायिक रूपें श्रीरामकांता । करूं न शके तो विधाता । तुम्ही तत्वतां महामूर्ख ॥८॥ पर्जन्याची जळगार । करूं न शकती अति चतुर । तेंवी ब्रह्मादिक सुरवर । कृत्रिम अवतार करूं न शकती ॥९॥ जैसी माझी सगुण काया । तैसी मद्रूप माझी छाया । मी धाडितें भिक्षा द्यावया । सुरकार्या साधावया ॥११०॥ ऐकोनि सीतेचे वचन । समस्तीं घातलें लोटांगण । सीतेचे वंदोनि श्रीचरण । राहिले लपोन विमानीं ॥११॥

भिक्षा घालण्यासाठी स्वत: न जाता आपल्या छायेला पाठवले, मूळ रूपात व छायेत तंतोतंत साम्य: भिक्षा घालावया लंकनाथा । सवेग छाया बाहेर येतां । हेचि मुख्यत्वें सती सीता । सत्य समस्तां मानलें ॥१२॥ ठाणमाण[3] गुणलक्षण । रूपरेखा[4] समसमान । सुर[5] सिद्ध साध्य चारण । अवघ्यांही ज्ञान सत्य सीता ॥१३॥ यक्ष राक्षस दैत्य दानव । सत्य सीता मानिता मानव । बाप[6] जानकीचें लाघव । छाया सजीव पैं केली ॥१४॥ सद्भावें समर्थ जानकी । स्वयें राहोनि अग्निमुखीं । छाया धाडिली भिक्षेसी निकी[7] । येतां सकळिकीं देखिली ॥१५॥ भिक्षा घेवोनि वेगेंसीं । उल्लंघोनियां मर्यादरेखेसी । सीता आली रावणापासीं । तंव येरू अभिलाषी[8] हरणार्थ[9] ॥१६॥

भिक्षा वाढीत असता रावणाने तिला धरले व तो खऱ्या स्वरूपात प्रकटतो : जेंवी छाया न राहे रूपापासीं । तेंवी उल्लंघोनियां मर्यादरेखेसी । भिक्षा देतां रावणासी । तो आकर्षी[10] सीतेतें ॥१७॥

हस्ते हस्तं विनिक्षिप्य चकार सुमहद्वपु: । तच्च सौम्यं परित्यज्य भिक्षुरूपं स राक्षस: ॥६॥

भिक्षा देतां अतीताप्रती । अतीतें सीता धरिली हातीं । तंव येरी आंसडोनि[11] हस्तगतीं । पडिला क्षिती रावण ॥१८॥ जंव रिघे मर्यादरेखेआंत । तंव तो आकर्षी लंकानाथ । सांडून भिक्षुवेष समस्त । जाला अद्‌भुत राक्षस ॥१९॥ दहा शिरें वीस भुजा । मी तंव लंकेचा हो राजा । तुज मी करीन निजभाजा । भोगीं माझा सुखभोग ॥१२०॥

सीतेजवळ रावणाचा अनुनय : राम तापसी दीनवदनी । कष्टलीसी वसतां वनीं । तुज करीन पट्टराणी । मुख्य विलासिनी मंदोदरी ॥२१॥ तुज बैसतां माझे अंकीं । मंदोदरी मुख्य सेवकी । ऐशीं सहस्र राण्या आणखी । तुझ्या बटकी मी करीन ॥२२॥ मी ब्रह्मयाचा नातु प्रसिद्ध । कुबेराचा धाकटा बंधु । माझा वंश अति शुद्ध । सांडीं छंदु श्रीरामाचा ॥२३॥ वसंत वळगे[12] शेजारें[13] । सेज रचिजे कुसुमाकरें । चंद्र निववी शीतळ करें । करीन किंकरें सुर

---

शब्दार्थ - कौतुकेकरून, २. अवतार, ३. शरीराची ठेवण, सुर, सिद्ध, साध्य, चारण ह्या देवजाती आहेत, ५. मोठे, ६. सरोवर, ७. इच्छी, ८. नेण्याकरिता, ९. ओढी, १०. हिसकावून, ११. राबतो, १२. शेजघरात, १३. वसंतऋतूने.

सिद्ध ॥२४॥ सुरश्रेष्ठ[१] इंद्रादिक । तुझे वोळंगेच[२] पायिक[२] । मुख्य मी आज्ञेचा सेवक । अलोलिक भोग भोगीं ॥२५॥ माझें देखिलिया अशोकवन । तुझें निवेल तन मन । धन्य म्हणसील दशानन । लंकाभुवन देखिलिया ॥२६॥

सीतेचा आक्रोश, रावणाला धाक देते : सीता आक्रंदे राम राम । रावण अत्यंत सकाम । तिचे प्राप्तीचा संभ्रम[३] । आवडीं खेंव देऊं पाहे ॥२७॥ सीता म्हणे रावणासी । वोळंबा[४] चाखों पाहे अग्नीसी । तेंवी तूं मज भोगूं पाहसी । जळोन मरसी मत्कामें ॥२८॥ पतंग आलिंगी दीपकळी । तो तत्काळ होय होळी । तैसी भोगूं जातां जनकबाळी । तूं सकुळीं मरशील ॥२९॥ अहल्याभिलाष सुरेंद्रा । सर्वांगीं भगें जाहली इंद्रा । तैसी अभिलाषितां रामदारा । बाणधारा निमसील[६] ॥१३०॥ श्रीराम सूर्य रावण खद्योत । राव कांजी श्रीराम अमृत । तुझें ठायीं जो भोगासक्त । ते निश्चित दंश मशक ॥३१॥ श्रीराम केवळ क्षीरसमुद्र । रावण मुताचे थिल्लर[७] । त्याचे ठायीं भोगतत्पर । ते शूकर नरदेही ॥३२॥ श्रीराम जगाचें जीवन । रावण डोंबाड[८] परिच्छिन्न । तेथें रमती ढोंक[९] हीन । साधु निमग्न श्रीरामीं ॥३३॥ अतिथिवेषें अति कपटी । संन्यासिरूपें स्त्रीलंपटी । विषयगोडीचिया गोष्टी । आमिषासाठी मरे मासा ॥३४॥

मम भर्ता तदा ब्रह्मन्वयसा सप्तविंशकः । अष्टादश तु वर्षाणि ममायुरवगम्यते ॥७॥

वयाचा विचार करताही त्याचा हा प्रयत्न निंद्य व दूषणास्पद : वना निघतां श्रीरामचंद्रा । सत्ता वीस वर्षे त्या अवसरा । माझें वय वर्षे अठरा । वसिष्ठद्वारा ऐकिलें ॥३५॥ तूं तंव बहुकाळाचा म्हातारा । विषय भोगितां आली जरा । तूं माझिया अभिलाषद्वारा । निशाचरा कां मरसी ॥३६॥ मज न्यावया कैंची शक्ती । वृथा वल्गतोसी धरूनि भ्रांती । धांवण्या येवोनि श्रीरघुपती । करील शांती बाणें एकें ॥३७॥ सुटल्या श्रीरामाचें कुऱ्हाडें[१०] । केउतें पळसी बापुडें । बाण सोडोनियां गाढे । धड दुधडें[११] पाडील ॥३८॥ श्रीराम येईल त्रिशुद्धी । रावणें जाणोनियां दुर्बुद्धी । सीता घेवोनिया खांदीं । चपळपदीं निघाला ॥३९॥ तंव पिशाचवदन खरसंयुक्ता । सारथियें सन्मुख आणिलें रथा । मग रावणें रथीं वाहोनि त्वरिता । होय निघता लंकेसी ॥१४०॥ एकाजनार्दना शरण । रावणें केले जानकीहरण । आतां ऐकोनि सीताआक्रंदन[१२] । जटायु दारुण युद्ध करील ॥४१॥ जटायु रावणातें दंडून । सीता सोडवील आपण । रावण करील जटायुच्छळण । तेंही निरूपण अवधारा ॥४२॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे जानकीरावणहरणं नाम षोडशोऽध्याय ॥१६॥ ओंव्या ॥१४२॥ श्लोक ॥७॥ एवं ॥१४९॥

# अध्याय सतरावा

## जटायु-रावण युद्ध

**सीतेला रथात बसवून रावणाचे प्रयाण :** श्रीरामचंद्राय नमः । रावण करोनि सीताहरण । सवेग निघाला आपण । ते काळींचें गमनलक्षण । सावधान अवधारा ।।१।।

वामेन सीतां पद्माक्षीं मूर्धजेषु करेण सः । ऊर्वोस्तु दक्षिणेनैव परिजग्राह पाणिना ।।१।।

ततस्तां परुषैर्वाक्यैरभितर्ज्य महास्वनः । अंकेनादाय वैदेहीं रथमारोहयत्तदा ।।२।।

---

**शब्दार्थ** - १. आज्ञेचे, २. सेवक, ३. घाई, ४. आलिंगन, ५. वाळवी, ६. मरशील, ७. डबके, ७. क्षुद्र, ९. बगळे, १०. बाण, ११. दुखंड, १२. सीतेचा शोक-रडणे.

सीता बैसवितां रथासीं । आंग टाकिलें भूमीसीं । रावणें धरोनियां केशीं । वाहोनि अंकासी बैसे रथीं ॥२॥ अंकीं बैसवितां पद्माक्षी । तेणें रावण जाला सुखी । सीता जाली परम दुःखी । धांवा[1] पोखी आक्रंदें ॥३॥

सीतेचा विलाप, आक्रंदन व लक्ष्मणाबद्दल अनुताप : धांव पाव गां श्रीरघुवीरा । सवेग धांवें गा सौमित्रा । रावणें हरूनि भिक्षाद्वारा[2] । लंकापुरा मज नेतो ॥४॥ केउता राम केउता रावण । कैसें केलें माझें हरण । म्यां अभिशापिला[3] लक्ष्मण । तें पाप पूर्ण मज फळलें ॥५॥ सौमित्र निष्पाप हरिदास । तो म्यां छळिला अति संत्रास । आतां कायसी रामआस । माझी निरास म्यां केली ॥६॥ सौमित्रा रामीं अनन्यभक्ती । तो म्यां छळिला अति वक्रोक्तीं । त्या पापाची सद्यःप्रचीती । रावणाहातीं आतुडलें[4] ॥७॥ श्रीरामाज्ञासंरक्षण । सौमित्र दवडिला म्यां छळून । तेणें पापें मज रावण । झोंटीं[5] धरोन नेतसे ॥८॥ लक्ष्मण मज मानी जननी । मी त्यासी म्हणें करिसी पत्नी । तेणें पापें फुटे अवनी । महापापिणी मी एक ॥९॥ लक्ष्मणीं मिथ्या अभिशाप[6] । तें मज माझें फळलें पाप । मज म्यां दिधला संताप । दुःख अमूप मज माझें ॥१०॥ जें पुढिलांसी[7] करी छळण । तेणें छळें छळें आपण । तें मज फळलें संपूर्ण । जें केशाकर्षण रावणें ॥११॥ छळणाची शीघ्र गती । सौमित्र पावला श्रीरघुपती । मी तंव पडलें रावणाचे हातीं । बंधप्राप्ती पावलें ॥१२॥ छळछद्मवक्रदृष्टी । महापापिणी मी ये सृष्टीं । आतां कैंची श्रीरामभेटी । दुखःकोटी मज माझी ॥१३॥ आतां नव्हे श्रीरामभेटी । श्रीराम न देखें दृष्टी । सौमित्रछळणासाठीं । दुःखकोटी मज माझ्या ॥१४॥ छळवाद्याचें निजमुख । श्रीराम न पाहे निःशेख । मज म्यां दिधलें अति दुःख । ऐसी अधोमुख विलपत ॥१५॥ महापाप्या परम गती । श्रीरामनाम जपतां अंतीं । त्याची करिसी तूं निर्मुक्ती । तैशिया गतीं मज पावें ॥१६॥ लक्ष्मणाच्या छळवादीं । होणारासारिखी घडली बुद्धी । तेणें लागलीसे आधी । कृपानिधे कृपा करीं ॥१७॥ मी तंव श्रीरामाची दासी । मजही गांजिलें राक्षसीं । आपलीं ब्रीदें सत्य करावयासी । धांव धांवण्या श्रीरामा ॥१८॥ लक्ष्मणा तुझे चरणीं माथा । जरी तूं मज मानिसील माता । तरी माझ्या छळणोक्ती समस्ता । क्षमा सर्वथा कराव्या ॥१९॥ श्रीरामभक्त तूं निष्पाप । तुज माजी नाहीं गा कोप । माझ्या छळणाचा संताप । कृपानुरूप सांडावा ॥२०॥

हा लक्ष्मण महाबाहो गुरुचित्तप्रसादक । ह्रियमायां न जानासि रक्षसा पापकर्मणा ॥३॥
जीवितं सुखमर्थं च धर्महेतोः परित्यजन् । ह्रियमाणामधर्मेण मां राघव न पश्यसि ॥४॥

लक्ष्मणाचा धावा : लक्ष्मणा वेगीं धांव पाव । सवें घेवोनि श्रीराघव । रावणाचा हरूनि गर्व । छेदीं सर्व प्रतापें ॥२१॥ तूं कां मजवरी रुसलासी । तुझे चरण झाडीन केशीं । थोर गांजिलें राक्षसीं । कवणापासीं मी सांगों ॥२२॥ नेणें परपुरुषाची मात । त्या मज रावणें लाविला हात । दुःखें करीं आकांत । का रघुनाथ विसरला ॥२३॥ छळोनि दवडिलासी दुरी । तो कोप सांडोनि जिव्हारीं । ऐसिये आकांतअवसरीं । पावें झडकरीं सौमित्रा ॥२४॥ तूं जनक तूंचि जननी । सखा सांगाती जिवलग वनीं । वेगीं पावें कळवळोनी । मजलागोनि सोडवावया ॥२५॥ विराध वधिला जिये बाणीं । तोचि बाण लावोनि गुणीं । प्रतापतेजें यावें गर्जोनी । मजलागोनी सोडवावया ॥२६॥

रामाचा धावा करून, त्यांना मृगासाठी पाठविल्याबद्दल मनस्ताप : पाप आहे माझे माथां ।

---

शब्दार्थ – १. धावा करू लागली, २. भिक्षेच्या मिषाने येऊन, ३. दुष्ट शब्दाने दुखविला, ४. सापडले, ५. वेणी धरून, केस धरून, ६. दोषारोप, ७. इतरांस, ८. दोरीला.

म्हणोनि नुपेक्षीं[1] श्रीरघुनाथा । तुझें श्रीरामनाम स्मरतां । पाप सर्वथा मज नाहीं ॥२७॥ महापापाच्या पर्वतकोडी । श्रीरामनाम क्षणें विभांडी[2] । येवोनि कृपेनें तांतडीं । माझी बांदवडी सोडवीं ॥२८॥ सोडावया देवांची बांदवडी । वना आलासी निजप्रौढीं । माझी फेडावया सांकडीं[3] । घाली उडी श्रीरामा ॥२९॥ म्यां पाठविलें मृगापाठीं । हेचि माझी बुद्धि खोटी । श्रीरामेंसीं पडली तुटी । दुःखकोटी मज माझ्या ॥३०॥ मागतां मृगांची कांचोळी । सर्व सुखाची जाली होळी । श्रीराम अंतरला महाबळी । धांवण्यार्थ छळीं सौमित्रा ॥३१॥

स्त्रियांनी पतिजवळ मागणे करू नये : भ्रतारापासीं जें मागणें । तें स्त्रियेचें निंद्य जिणें । मागण्यानिमित्त मज रावणें । आकर्षणें निजबंदीं ॥३२॥ भ्रतार जें दे संतोषोन । तें स्त्रियेसी अति पावन । स्वमुखें मागतां आपण । दुःख दारुण पावलें ॥३३॥ माझ्या मागण्याची कथा । माझी मजचि आली घाता । बंदीं पडलें लंकानाथा । श्रीरघुनाथा अंतरलें ॥३४॥

सीतेचा अनुताप : ऐसी अतुतापें संतप्ता । आपली आपणा अपराधता[4] । स्वयें अनुवादे सीता । दुःखार्थ अति दुःखी ॥३५॥ दूरी अंतरला रघुनंदन । त्यापासीं गेला लक्ष्मण । माझें अत्यंत आक्रंदन[5] । दोघे जण नायकती ॥३६॥ माझें उत्तर पडतें कानीं । दोघे येते अति गर्जोनी । रावणा बाणीं निर्दळोनी । अर्धक्षणीं सोडविते ॥३७॥ निरोप धाडावया श्रीरामासी । सीता पाहे द्विजशिष्यांसी । ब्राह्मण पळाले धाकेंसीं । निजपत्न्यांसी घेवोनी ॥३८॥ ते वेळीं सीता पाहे आपण । वृक्षवल्लींस रिघे शरण । श्रीरामा सांगावें आपण । मज रावण नेतसे ॥३९॥

> आमंत्रये जनस्थानं कर्णिकारांश्च पुष्पितान् । नमस्करोम्यहं तेभ्यो भर्तुः शंसत मां हृताम् ॥५॥
> यानि कानिचिदप्यत्र सत्वानि विविधानि च । सर्वाणि शरणं यामि मृगपक्षिगणानपि ॥६॥
> दैवतानि च यान्सस्मिन्वने विविधपादपे । क्षिप्रं रामाय शंसध्वं सीतां हरति रावणः ॥७॥
> विदित्वा तु महाबाहुरमुत्रापि महाबलः । आनेष्यति पराक्रम्य वैवस्वतहृतामपि ॥८॥

पंचवटीतील सर्व चराचर सृष्टीला सीतेचा संदेश : जनस्थानींचे जन वन । त्यांसीं घालितें मी लोटांगण । श्रीरामा सांगावें आपण । केलें सीताहरण रावणें ॥४०॥ कर्णिकारादि बिल्व आम्र । समस्त वृक्षां नमस्कार । श्रीरामा सांगावें शीघ्र । सीता दशवक्त्र[6] नेतसे ॥४१॥ गुल्म लता तृण पाषाण । दैवतें श्वापदें पक्षिगण । त्यांसी माझें लोटांगण । सांगावे आपण श्रीरामा ॥४२॥ सिंह व्याघ्रादि श्वापदें क्रूर । त्यांसी माझा नमस्कार । धांवण्या धाडावा श्रीरघुवीर । दशशिर वधावया ॥४३॥ काग बक कारंडक । हंस मयूर चातक शुक । श्रीरामा सांगावें आवश्यक । सीता दशमुख नेतसे ॥४४॥ जळदेवता वनदेवता । आकाशींच्या गुप्त देवता । तुम्हीं सांगावें श्रीरघुनाथा । रावण सीता नेतसे ॥४५॥ श्रीरामा सांगावया जाण । वाचा पावोत तृण पाषाण । तिहीं सांगावें संपूर्ण । सीता रावण नेतसे ॥४६॥ विनवीतसें पंचभूतां[7] । तुम्ही सांगावें श्रीरघुनाथा । धांवण्या धाडावा शीघ्रता । लंकानाथा वधावया ॥४७॥

रामांना समजल्याबरोबर ते मागोमाग येतीलच असा तिला विश्वास : न भेटेतां जनकबाळी । स्वर्ग मृत्यु आणि पाताळीं । श्रीराम घेवोनि घरधांडोळी[8] । मज तत्काळीं आणील ॥४८॥ माझें ऐकतां हरण । सवेग येवोनि लक्ष्मण । रागें निर्दाळील रावण । अर्ध क्षण न लागतां ॥४९॥ रामें ऐकतां माझें हरण । जेथींचा तेथें सोडोनि बाण । घायीं रावणाचा घेईल प्राण ।

---

शब्दार्थ – १. हयगय करू नकोस, २. नाहीसे करी, ३. संकट, ४. बोले, ५. रडणे, ओरडणे, ६. दहा तोंडांचा (रावण), ७. पृथ्वी, आप, वायू, तेज व आकाश, ८. झडती.

सोडवण तेणें माझी करील ।।५०।। लोकालोककुळाचळीं[1] । लपविल्याही जनकबाळी । राम राक्षसां करील होळी । मज तत्काळीं सोडवील ।।५१।। रावणें माझा केलीया घात । ऐसा प्रतापी श्रीरघुनाथ । पाडोनियां यमाचे दांत । मज निश्चित आणील ।।५२।। माझिया प्रेमाचे आवडीं । श्रीराम काळाची मुरडील नरडी । तेथें राक्षसें कोण बापुडीं । बाणीं रोकडी निर्दळील ।।५३।। ऐसिया प्रतापी श्रीरघुनाथा । माझिया दुस्तर आकांता । कां पां न पवसीच तत्वतां । म्हणोनि सीता विलपत ।।५४।। सीता स्वयें येचि अर्थीं । ज्या त्या येतसे काकुळती । शुद्धि[2] सांगावी श्रीरघुपती । रावणवधार्थी शीघ्र यावें ।।५५।। धांव पाव श्रीरामचंद्रा। वेगीं यावें श्रीसौमित्रा । मज गांजिलें राक्षसेंद्रा । कृपासमुद्रा कां न पावसी ।।५६।। मरमर पापिया अदृष्टा[3] । दुःखें फळलेंसी दुष्टा। वंचोनि श्रीरामवरिष्ठा । वश्य दुष्टा मज केलें ।।५७।। मी जनकबाळा जानकी । श्रीरामाची निजसेवकी । रावणें दुष्टे केलें दुःखी । दशमुखी निर्बंध[4] ।।५८।। श्रीरामा तुझी अगाध थोरी। तुझें देहागार[5] फोडिलें चोरीं । चोरोनि नेली तुझी अंतुरी[6] । हे चराचरीं तुज लाज ।।५९।। आपले लाजेकारणें । माझें करावें धांवणें । ऐसें सीतेचें आक्रंदणें । दीर्घस्वरें विलपत ।।६०।। ऐकतां सीताविलपन । व्याघ्रसिंहादि करिती रुदन । वृक्ष स्रवती संपूर्ण । गळती लोचन पक्ष्यांचें ।।६१।। दुःखें फुटों पाहे अवनी । दुःखे द्रव आला पाषाणीं । दुःख न समाये गगनीं । ऋषिजनीं आकांत ।।६२।।

**सीतेचा धावा ऐकून रावण घाबरला व तो आकाशमार्गाने जाऊ लागला :** ऐकोनि सीतेचें रुदन । रावण झाला कंपायमान । वेगें आलिया रघुनंदन । माझा प्राण घेईल ।।६३।। जेणें मारिले खर दूषण । मारीच मारीला विंधोनि बाण । विराध मारिला संपूर्ण । अर्धक्षण लागेना ।।६४।। ताटका सुबाहु मारिला जांण । विराध मारिला संपूर्ण । तो श्रीराम माझा घेईल प्राण । ऐसी रावणा धुकधुकी ।।६५।। सीता करील दीर्घ रुदन । तिसीं देवोनि आलिंगन । रथीं बैसोनि रावण । लंघी गगन अति धाकें ।।६६।। रावणाची शक्ति केसी । सीता धरोनि पोटासीं । रथ चालवी आकाशीं । येरी आक्रोशीं आक्रंदे ।।६७।। ऐकोनि आक्रंदतां सीता । तंव जटायु आला सकोपता[7] । माझिया स्वामीची हे कांता । तिये गांजिता तूं कोण ।।६८।।

> ततः पर्वतकूटाभस्तीक्ष्णतुंडः खगोत्तमः ।। वनस्पतिगतः श्रीमान्व्याजहार शुभां गिरम् ।।९।।
> दशग्रीवः स्थितो धर्मे पुराणे सत्यसंश्रवः । भ्रातस्त्वं निंदितं कर्म कर्तुं नार्हसि सांप्रतम् ।।१०।।
> राजा सर्वस्य लोकस्य रामो दशरथात्मजः । तस्यैषा लोकनाथस्ये धर्मपत्नी यशस्विनी ।।११।।
> सीता नाम वरारोहा यां त्वं हर्तुमिहेच्छसि । कथं राजा स्थितो धर्मे परदारान्परामृशेत् ।।१२।।

**मार्गात जटायूचे आगमन :** रावणें सीता हरितां । तंव जटायु वनक्रीडे गेला होता । ऐकोनि जानकी आक्रंदतां । सवेगता तो आला ।।६९।। त्रैलोक्यराजा श्रीरघुनाथ । मी जटायु श्रीरामभक्त । तूं रावणा अति उन्मत्त । सीतेसी हात लाविला ।।७०।। पर्वतप्राय महाबळी । मी असतां ये वनस्थळीं । केवी नेसील जनकबाळी । रणरांगोळी मी करीन ।।७१।। पंचवटीं आश्रमानिकट । बैसलें असतां माझें मेट[8] । तुज कैसेनि फुटेल वाट । महानष्ट तूं परद्वारी ।।७२।। श्रीरामारायाची अंतुरी[9] । नेऊं पाहसी करोनि चोरी । चोरासी मी जीवें मारीं । तुझी उरी उरों नेदीं ।।७३।। चोरापासीं वस्तुजात[10] । सोडवोनि करीं घात । तेंवी सीता सोडवोनि येथ। तुझा निःपात करीन मी ।।७४।। चौदा चौकड्यांचें राज्य शिरीं । शेखीं करों धांवसी

---

शब्दार्थ - १. या नावाचे पर्वतविशेषांनी, ३. शोध, ४. प्रारब्धा, ४. रावणाचा प्रतिबंध, ५. देहरूप घर, ६. स्त्री, ७. क्रोधयुक्त होऊन, ८. पहाऱ्याचे नाके, ९. स्त्री, १०. वस्तुमात्र.

चोरी । जळो रावणा तुझी थोरी । पापी परद्वारी महानष्ट ॥७५॥

यस्य त्वं लोकनाथस्य हृत्वा भार्यां गमिष्यसि । वृंतादिव फलं त्वां तु पातयेयं रथोत्तमात् ॥१३॥

त्रैलोक्यस्वामी श्रीरघुनाथ । त्याची चोरोनि नेतां कांता । तुझ्या करीन निःपाता । जेंवी सदेंठ वृंताक[१] ॥७६॥ जैसीं कां परिपक्क फळें । सदेंठ झडती वायुबळें । तैसीं तुझीं कंठनाळें । दाही शिरकमळे छेदीन ॥७७॥

जटायूने आपल्या पंखांच्या तडाख्याने रावणाचा रथ थांबवून त्याला युद्धाचे आव्हान : जटायुपक्षवात दुर्धर । न चले रावणाचा रहंवर[२] । मागें ओसरले रथाचे खर । तंव दशशिर क्षोभला ॥७८॥ धनुष्या वाहोनियां[३] गुण । जटायु लक्षोनियां पूर्ण । नाळीकनाराचांचे[४] वर्षे बाण । युद्ध दारुण मांडिलें ॥७९॥ तुझ्या शस्त्रांचा कडकडाट । नखीं पाखीं करीन पीठ । माझी चंचु अति तिखट । दाही कंठ छेदीन ॥८०॥ अरे मी जटायु न भेटतां । रावणा तुझी प्रतापता । हिरोनि नेतां श्रीरामकांता । तुज मी आतां मारीन ॥८१॥ रावण कायसें बापुडें । दाहा तोंडांचें जड किडें । हाणोनियां चंचुवाडें । सवक्त्र[५] हाडे फोडीन ॥८२॥ चोरितां श्रीरामाची कांता । कीर्ति पळाली अपकीर्तिता । पापें शक्ति गेली लंकानाथा । तुज मारितां क्षण न लागे ॥८३॥ पापें जालासी निर्वीर्य । तुज युद्धीं कैंचें धैर्य । मारोनियां राक्षस सर्व । श्रीरामकार्य साधीन ॥८४॥

रावण-जटायू द्वंद्व युद्ध : रावण वर्षे दुर्धर बाण । जटायु पांखीं उडवी पूर्ण । बाणप्रताप जाला क्षीण । रागें रावण क्षोभला ॥८५॥ जटायुपांखांच्या झडाडीं । विसां हातां वळे वेंगडी । दाही शिरें कांपती गाढीं । धनुष्य ओढी न ओढवे ॥८६॥ जटायुपक्षांच्या आवर्ता । आवर्ती पाडिले लंकानाथा । पुढें ढळों नेदी रथा । अति विघाता पेटला ॥८७॥

युद्धामुळे मार्गात विलंब होऊ लागल्यामुळे रावणाला राम येण्याची भीती : रावण पावला आकांता । जटायु ढळों नेदी रथा । मागोनि आलिया श्रीरघुनाथा । माझ्या घाता तो करील ॥८८॥ मारीच बोलला सत्य वचन । करूं जाता सीताहरण । आम्ही दोघे पावों मरण । तें प्रमाण दिसताहे ॥८९॥ नाहीं इंद्रजित[६] कुंभकर्ण । नाहीं साह्य सैन्य प्रधान । मज मारितां राखेल कोण । अति उद्विग्न लंकानाथ ॥९०॥ अति प्रयासें सीता आली हाता । हे पावल्या लंकेआंतौता[७] । तेथें येवों न शके रघुनाथा । दुर्घट पंथा क्रमेना ॥९१॥ लंकादुर्ग आणि गूढ[८] । भोवता समुद्राचा अगड । श्रीराम मानवी अति जड । मार्ग अवघड कंठेना ॥९२॥ परी प्रस्तुत जटायु दारुण । दृढ ओढवलें[१०] विघ्न । हें शंकरें करावें निवारण । लंकाभुवन तो पाववो ॥९३॥ पुढें जटायु मार्गरोधन । मागोनि आलिया श्रीरघुनंदन । माझा घेईल तो प्राण । धाकें रावण धुकधुकी ॥९४॥ एकेचि वेळें शतबाण । जटायूतें विंधी रावण । येरें चुकविलें तळपोन । आला कोपोन तडपित ॥९५॥

ततोऽस्य सशरं चापं मुक्तामणिविभूषितम् । पक्षाभ्यां स महातेजा बभंज पतगेश्वरः ॥१४॥

सारथिं सरथोपस्थं स जघान नखांकुरैः । कांचनोरश्छदान्दिव्यान्पिशाचवदनान्खरान् ॥१५॥

पूर्णचंद्रप्रतीकाशं छत्रं च व्यंजनैः सह । पातयामास वेगेन ग्राहिभी राक्षसैः सह ॥१६॥

रावणबाणाविषयी जटायू निर्भय, रावणाचे धनुष्य मोडून, मुकुट पाडून शरीरावर हल्ला : रावणाच्या धनुष्यावरी । मुक्ताफळांच्या झालरी । सुवर्णबद्ध मणिमय मंजरी । घेवोनि करीं विंधित ॥९६॥ जटायूने सवेग पांखीं । रावण झडपिला दाही मुखीं । चाप छेदोनि सांडिलें नखीं ।

---

शब्दार्थ – १. वांगे, २. रथ, ३. चढवून, ४. नाळीक व नाराच नावाचे बाण, ५. तोंडासकट, ६. या नावाचा रावणाचा मुलगा, ७. लंकेत, ८. गुप्त, ९. खंदक, १०. आले.

मुकुट मस्तकींचा पाडिला ॥९७॥ सर्वेचि ध्वज[1] छेदिला चांग । शशांकछत्राचा केला भंग । रावणाचें अंगप्रत्यंग । नखीं सवेग विदारी ॥९८॥ जटायुपक्षवातावर्त । रावण चळचळां कांपत । चंचूनें धरोनियां रथ । गगनाआंत उचलिया ॥९९॥ मग सीता धरोनि पोटासीं । रावण उडी टाकी वेगेंसीं । पिशाचवदन खर रथासीं । नखाग्रेंसीं मारिले ॥१००॥

**रावणाचा रथ, घोडे, सारथी यांचा विध्वंस :** तेथोनि टाकिता रहंवर । सारथी वारुवेसीं शतचूर । दणकां दुमदुमलें अंबर । दशशिर चळीं कांपे ॥१॥ मुहूर्तीं केला छत्रपात । भंगिले चाप भंगिला रथ । रावण केला हताहत[3] । धन्य पुरुषार्थ जटायूचा ॥२॥ देखोनि जटायु साटोप[4] । स्वर्गीं देव वानिती प्रताप । धन्य धन्य जटायूचें तप । केला प्रताप रामकार्जीं ॥३॥ रावण विचारी निजचित्ता । जटायु आलिया न जिरे सीता । इसी सांडोनियां जातां । आली लघुता तिहीं लोकीं ॥४॥ सहित पार्वतीमहेश । म्यां आंदोळिला गिरि कैलास । आणी जिंकोनि कुबेरास । विमानास हरितलें ॥५॥ देवांचिया अमित कोडी । अद्यापि माझे बांदवडीं । त्याहीं माझी गर्वझाडी । केलीं रोकडी येणें पक्षें ॥६॥ जटायुचंचु अति तिखट । शस्त्रसमुदाय केला सपाट । यापोसोनि न फुटे वाट । परम कष्ट रावणा ॥७॥

स भग्नधन्वा विरथो हताश्वो हातसारथिः । अंकेनादाय वैदेहीं पपात भुवि रावणः ॥१७॥

भंगिलें धनुष्य भंगिला रथ । सारथि वारुवां केला घात । विरथी पदाती लंकानाथ । मग कपटार्थ मांडिला ॥८॥

**रावण गुप्तरूपाने आकाशमार्गाने जातो :** राक्षसाची गुप्तस्थिती । कडिये घेवोनि सीता सती । रावण निघे खेचरगती । गगनपंथीं अति गुप्त ॥९॥ परी जटायूसी अरुणभेटी । त्यास सहज दिव्यदृष्टी । तेणें सीता नेतां देखोनि दृष्टीं । रावणापाठीं लागला ॥१०॥

स विदार्य नखैस्तीक्ष्णैस्तस्य पृष्ठं समंतः । केशांश्चोत्पाटयामास नखपक्षमुखायुधः ॥१८॥

स तदा गृध्रराजेन क्लिश्यमानो मुहुर्मुहुः ॥ ततः क्रोधाद्दशग्रीव : सीतामुत्सृज्य वीर्यवान् ॥१९॥

**तरीही जटायूने त्याला मार्गात गाठून घायाळ केले :** जटायु धांवला सरोखीं । सबळ बळें निजपांखीं । रावण झडपिला दाही मुखी । विदारी नखीं सर्वांग ॥११॥ तिखट नखें दशशिरा । सर्वांगीं लागल्या रुधिरधारा[6] । देहांत मांडला दशशिरा । साह्य दुसरा नाहीं कोणी ॥१२॥ नखें पाखें चंचु तीक्ष्ण । घायीं घायवटला[7] रावण । आतां माझे न वांचिती प्राण । योद्धा दारुण जटायु ॥१३॥ जटायु तळपोनि आकाशीं । केंस उत्पाटी दाढी मिशी । भेणें रावण कासाविसी । जीविता शेंसी सांडिले ॥१४॥

**सीतेला सोडून रावण पळाला :** मारीचवाक्य सत्यभाषण । करितां जानकीचें हरण । अवश्य पावसील मरण । तें प्रमाण दिसताहे ॥१५॥ रावण म्हणे जानकी नेतां । जटायु करील माझ्या घाता । भेणें सांडोनियां सीता । होय पळतां लंकानाथ ॥१६॥ जटायूनें गांजिलें वनी । वेगीं धांवा पावा कोणी । ऐसा रावण आक्रंदोनी । सीता सांडोनि पळाला ॥१७॥

**सीता मुक्त झाल्यावर जटायूचे तिला अभयवचन:** तंव जटायु म्हणे लंकानाथा । जरी तुवां सांडिली सीता । तरी तुज न मारीं सर्वथा । जीवदान तुज दिधलें ॥१८॥ रावणापासोनि जानकी । सुटोनि जाली अति सुखी । जटायु दादुगा[8] तिहीं लोकीं । केवळ पक्षी म्हणों नये ॥१९॥ सीताहरण महा-पाप्यासी । उपडोनि दाढ्या मिशांसी । प्रायश्चित दिधलें रावणासी । जटाय ऋषि धर्मात्मा ॥२०॥

---

शब्दार्थ - १. पताका, २. चंद्राच्या आकाराचे छत्राचा, ३. घाबरा, पराजित, ४. आवेशयुक्त, ५. पादचारी, ६. रक्ताच्या धारा, ७. घायाळ झाला. ८. बलवान्.

स्वर्गस्थ देवांना चिंता : जटायु सोडवितां सीतेसी । तंव स्वर्गी हडबड देवांसी । बंधनिर्मुक्त नव्हे आम्हांसी । सीता लंकेसी न वचतां[1] ॥२१॥

रावणाने परत येऊन जटायूला द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले, पुन्हा रावणाचा पराजय : ऐसें देवांचें मनोगत । तंव रावण जाला सावचित्त । मग होवोनियां निजयुद्धार्थ । पाचारित जटायूसी ॥२२॥ सीता होती मजपासीं । तेणें त्वां केलें कासाविसी । आतां युद्ध सावकासीं । पुरुषार्थेसीं करूं दोघे ॥२३॥ गुंफेसीं नसतां श्रीरामलक्ष्मण । शून्य मंदिरीं रिघे श्वान । तेंवी तुंवा सीता चोरून । पलायमान भयभीत ॥२४॥ तुज कैचे दांदुलेपण[2] । वेगीं पळसी रामाभेण[3] । मजसीं करूं पाहसी रण । तरी आंगवण पाहों तुझी ॥२५॥

तयोर्महति संग्रामे बभूवातुलविक्रम: । राक्षसांना च मुख्यस्य पक्षिणां प्रवरस्य च ॥२०॥

दहा शिरें वीस भुजा । राक्षसांचा मुख्य राजा । पक्षी पावला युद्धा पैजा । बळसमाजां वरिष्ठ ॥२६॥ रावणाचें शस्त्र शर । पूर्वी जटायूनें केलें चूर । आतां निजांगें दशशिर । मुष्टिप्रहार हाणों धांवे ॥२७॥ ऐसा अति क्रोधें दशशिर । बळें हाणिता करप्रहार । तंव नखें विदारिला कर । वेगें दुर्धर जटायु ॥२८॥ रागें हाणितां दृढ लात । तंव चंचुघातें करोति घात । रावण केला अस्ताव्यस्त । मग लंकानाथ गजबजिला ॥२९॥ तळपोनियां गगनीं भरे । झडपा हाणोनी दाही शिरें । मस्तक भेदी चंचुचक्रें । मुखें नखाग्रें विदारी ॥३०॥ नखीं पांखी चंचुधारें । रावणा लागलें घायवारें । धाकें धाकें जिकडे सरे । तिकडे नखाग्रें मारिजे ॥३१॥ जटायुपक्षांचा आघात[4] । रावण उडविला नभाआंत । गगनीं भोवंडोनि आवर्त । पाडिला मूर्च्छित अधोमुख ॥३२॥ येथोनि पुरे पुरे रण । रावण दांतीं धरी तृण । अकाली ओढवलें मरण । जटायु प्राणघातक ॥३३॥ मी म्हणें हें पाखरूं । परी हा धीर वीर महाशूरू । विसां भुजांचा केला चूरू । अति दुर्धरू जटायु ॥३४॥ जटायुनें लाविली सीक । दाही मुखेसीं विमुख । रावण पाडिला अधोमुख । जीवा संकट मांडलें ॥३५॥ न चलेबळाची आंगवण । परम दु:खी जाला रावण । मग करावया जटायुछळण । कपट पूर्ण मांडिलें ॥३६॥ मग रावण म्हणे लवला हीं । दोघे झुंजों उसिणाघायीं[6] । तंव जटायु म्हणे तुज शक्तीच नाहीं । उसिणें कैं फेडशील ॥३७॥ घाय आणितां (हाणिता) सवर्म । न पळे न ढळे तो योद्धा परम । तूं नेणसी युद्धधर्म । व्यर्थ आक्रम बळाचा ॥३८॥

रावणाचे कपटी वर्तन. परस्परांचे मरण कशात आहे ते सांगावे, जटायूला रामांची शपथ : घालोनि श्रीरामाची आण । जटायूसी पुसे रावण । तुझें कोणें ठायी मरण । सत्य संपूर्ण मज सांगें ॥३९॥ पडलिया अति आकांती । ओढवल्याही अंतगती । हरिभक्त असत्य न बोलती । जाण निश्चिती पक्षिनाथ ॥४०॥ भावार्थ दावोनि उदंड । मधुर शब्दीं असत्य लंड[7] । त्याचें मुख नरकुंड (नरककुंड) । काळें तोंड तयाचें ॥४१॥ जटायु म्हणे रावणासी । जरी तूं निजमृत्यु सांगसी । तरी मी सांगेन तुजपासीं । येरयेरांसी नेम जाला ॥४२॥

त्याप्रमाणे जटायू खरे व रावण खोटे सांगतो : घातली श्रीरामाची आण । तरी असत्य न बोलें गेलिया प्राण । दोहीं पाखीं माझें मरण । सत्य संपूर्ण वदे पक्षी ॥४३॥ रावण छळवादी पातकी । मृत्यु सांगे । वामांगुष्ठनखीं । जटायु सांगे दोहीं पाखीं । युद्धसात्विकी सत्यवादी ॥४४॥

जटायूच्या मर्मावर रावणाचा आघात, अवंढापट्टा येथे रावणाचा अंगठा पडतो : जटायु तळपोनियां देख । छेदिलें वामांगुष्ठनख । तंव हातातहीं आले पांख । येरें नि:शंक उपडिले ॥४५॥ रावणाचा छदिला आंगोठा । तेथे जाला अवंढापट्टा । त्रिंबकीच्या निकट घाटा । अवंढापट्टा प्रसिद्ध ॥४६॥ जटायूस येतां मरण । पडल्या करीत श्रीरामस्मरण । नष्ट रावणें केलें

शब्दार्थ – १. न जाता, २. मोठेपणा, ३. श्रीरामाला भिऊन, ४. प्रकार, ५. शिक्षा, ६. दे घे अशा मोबदल्याने, ७. नष्ट.

छळण । कुळ निर्दळण देखसी ॥४७॥ छळवादी अति दुष्ट । परम पापी क्रियानष्ट । परदारी अति पापिष्ट । भोगिसी कष्ट छळणाचें ॥४८॥ छळणाच्या कपटनिष्टीं । जटायु मूर्च्छित पडला सृष्टीं । श्रीरामाच्या निजभेटीं । आत्मा कंठीं धरिलासे ॥४९॥ मुखीं श्रीरामनाम-स्मरण । चित्तीं श्रीरामचिंतन । नयनीं श्रीरामावलोकन । हृदयीं ध्यान श्रीरामाचें ॥५०॥

जटायू श्रीरामदर्शनाची वाट पाहात नमस्कार करीत राहातो : श्रीरामरूप देखे पाषाण । श्रीरामरूप देखे तृण । वृक्ष वल्ली वन उपवन । देखे संपूर्ण श्रीराम ॥५१॥ श्रीरामकाजीं वेंचितां प्राण । श्रीराम कृपाळु आपण । सर्वरूपें स्वयें संपूर्ण । आला वोरसोन[1] भेटीसी ॥५२॥ जटायूचें निजपोटीं । अंतीं श्रीराम देखावा दृष्टीं । देह पडतां स्वयें सृष्टीं । आला भेटी निजभक्ता ॥५३॥ रावण नव्हे माझा वैरी । तो तंव परमार्था साह्यकारी । श्रीराम भेटविला चराचरीं । सुखसागरीं सुखी केलें ॥५४॥ निजभक्तांचें मनोगत । पुरवूं जाणे श्रीरघुनाथ । जटायु जन्ममरणातीत[2] । आनंदभरित सुखी केला ॥५५॥ एकाजनार्दना शरण । जटायु छळणें वधी रावण । पुनरपि तो सीताहरण । करील आपण तें ऐका ॥१५६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां जटायुच्छलनवधो नाम सप्तदशोध्यायः ॥१७॥ ओव्या ॥१५६॥ श्लोक ॥२०॥ एवं ॥१७६॥

## अध्याय अठरावा

### रावण सीतेला अशोकवनात पाठवतो

जटायू मूर्च्छित झाल्यामुळे सीतेचा शोक : श्रीरामचंद्राय नमः ॥ जटायूस स्वयें रावण । वधिता जाला करोनि छळण[3] । ते देखोनि सीता जाण । झाली आपण अति दुःखी ॥१॥

तं स्वल्पजीवितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् । निरीक्ष्य पतितं सीता विललाप सुदुःखिता ॥१॥

जटायूचे उपडितां पांख । भूमीं मूर्च्छित जीव निःशेख । त्याचें देखोनियां असुख[4] । परम दुःख सीतेसी ॥२॥ न पवतीच श्रीरामलक्ष्मण । जटायु करितां सोडवण । तों त्यासीच आलें मरण । कपटी रावण दुष्टात्मा ॥३॥ जटायूसी म्हणे आपण । तुझें मज न येचि कां मरण । तूं बळियां बळीं संपूर्ण । मजलागीं प्राण वेंचिला ॥४॥ युद्धीं गांजोनि रावण । माझी केली सोडवण । तुझें करोनियां छळण । मारी रावण महापापी ॥५॥ ऐसें बोलोनि सुंदरी । लल्लाट पिटी निजकरीं । जो होय माझा साह्यकारी । तो निशाचरीं मारिजे ॥६॥ वेगीं पावता श्रीरघुनंदन । तरी तुझा वाचविता प्राण । माझी करिता सोडवण । रणीं रावण मर्दोनी ॥७॥ जटायु सबळ धांवणे करी । जटायु माझा साह्यकारी । जटायु माझा निजवैवारी[5] । तोही निशाचरीं मारिला ॥८॥ रावण विचारी मानसीं । चराचर साह्य श्रीरामासी । भलता सोडवील सीतेसी । शीघ्र लंकेसी हे न्यावी ॥९॥ शंकरें टाळिलें जटायुविघ्न । आणि उठलिया आन । मज न ठाके[6] लंकाभुवन । शीघ्र गमन करावें ॥१०॥

तां क्लिष्टमाल्याभरणां विलपन्तीमनाथवत् । अभ्यधावत वैदेहीं रावणो राक्षसाधिपः ॥२॥

क्रोशंती राम रामेति रामेण रहितां वने । जावितांताय केशेषु जग्राहान्तकसंनिभः ॥३॥

---

शब्दार्थ - १. प्रेमयुक्त होऊन, २. जन्म मरण ज्यास नाहीत असा, ३. कपट, ४. दुःख, ५. पाठिराखा, ६. पोचवणार नाही.

**रावणाला रामांच्या सामर्थ्याची सीता जाणीव देते :** केलिया जटायूच्या घाता । दुःखभरें आक्रंदे सीता । तिसी धरावया मागुता । होय धांवा लंकानाथ ॥११॥ रावणासी म्हणे सीता । तूं मला लंकेसी नेतां । करविसी राक्षसांचे अंता । तूं निजघाता पावसी ॥१२॥ जटायूसीं करितां रण । तुवां धरिले दातीं तृण । तेथें आलिया श्रीरामबाण । कुळनिर्दळण तुजसहित ॥१३॥ कासया समुद्र अचाट । कायसें लंकेचें त्रिकूट । बाणें एकें करील पीठ । तुजसगट राक्षसां ॥१४॥ ऐसें बोलतां सीतेसीं । कोप आला रावणासी । मग धांवोनि धरली केशीं । जेंवी जीवांसी अंतक ॥१५॥

**सीतेला धरताना तिच्या हिसक्याने रावण खाली पडतो :** रावणें धरतांची सीता । रागें लोटी लंकानाथा । तंव चांचरोनि[1] पडे पालथा । धांवे मागुता धरावया ॥१६॥ जेंवी भेकापासीं[2] आलिया सर्प । तेंवी सर्वांगीं होय कंप । देखोनि सीतेचा प्रताप । अति कंप रावणा ॥१७॥ युद्धा प्रवर्तलिया सीता । मज नाटोपे सर्वथा । ऐसें कळलें लंकनाथा । श्रीरामकांता दुर्धर[8] ॥१८॥

**वीस हातांनी तिला धरून त्याचे पुढे प्रयाण :** ऐसें रावणें विचारोनि मनीं । विसां भुजीं आकळोनी । सीता धरिली आंवळोनी । जेंवी कां स्वप्नीं निधान[3] ॥१९॥ मज सीता जाली प्राप्त । रावणाचा मनोरथ । स्वप्नप्राय अवघा व्यर्थ । तोही कथार्थ अवधारा ॥२०॥ जरी निर्बळ असती सीता । तरी रावण बलात्कारें भोगिता । तिची जाणोनि सबळता । होय प्रार्थिता शरणार्थी ॥२१॥ रावणापासोनि सीता । क्षण न लगे स्वयें सुटतां । परि निर्दळावया दुष्टां समस्तां । निजहरणार्था आक्रंदे ॥२२॥ पुढील रामायणी कथा । दुसरेनि रावण हरी सीता । उल्लास राक्षसाचे चित्ता । लंकेस नेता तो होय ॥२३॥

खमुत्पतंतं तं दृष्ट्वा मैथिली जनकात्मजा । दुःखिता परमोद्विग्ना भये महति वर्तिनी ॥४॥

रथ भंगिला तो जटायून । नाहीं आणविलें विमान । गगनगति[4] दशानन । सीता घेवोन निघाला ॥२४॥ सीता सोडविली जटायून । तेणें सुखी जाले ऋषिजन । सवेंचि तिचें करितां हरण । तपोधन तळमळती ॥२५॥ जळचर भूचर खेचर । जंगम आणि स्थावर । तळमळती जीवमात्र । सीता दशवक्त्र[5] नेताचि ॥२६॥ सीता निजखांदी घेऊन । खेचरगतीं[6] निघे रावण । ठाकावया लंकाभुवन । सवेग आपण निघाला ॥२७॥

**आपला शोध लागावा म्हणून सीता अलंकार टाकीत जाते :** तो मार्ग कळावया श्रीरामासी । सीता सांडी निजचिन्हांसी । मार्गोमार्गी निजमाळेसीं । सांडी सुमनांसी मार्गार्थ ॥२८॥ श्रीराम येईल धांवणियासी । ही आशा सीतेचे मानसीं । यालागीं मार्गामार्गासीं । प्रदेशोप्रदेशीं[7] चिन्हें सांडी ॥२९॥ उल्लंघोनि महापर्वत । पंथ क्रमिला महादुस्तर । शुद्धि पावावया श्रीरघुनाथ । वस्त्रें शुद्ध्यर्थ सीता सांडी ॥३०॥

ह्रियमाणा तु वैदेही कंचिन्नाथमपश्यती । ददर्श गिरिशृंगस्थान्पंचवानरपुंगवान् ॥५॥
तेषां मध्ये विशालाक्षी कौशेयं कनकप्रभम् । उत्तरीयं वरारोहा शुभान्याभरणानि च ।
मुमोच यदि रामाय शंसेयुरिति भामिनी ॥६॥

लंघोनि पर्वतां थोरथोरां । कृष्णा वेण्या तुंगभद्रा । नदिया लंघोनि दुस्तरा । लंकापुरा मज नेतो ॥३१॥ धांवण्या न येववे श्रीरघुनाथा । कोणी न देखें सोडविता । ऐसे जाणोनियां सीता । परम चिंता पावली ॥३२॥

---

शब्दार्थ - १. धडपडून, २. बेडकाजवळ, ३. धनाचा ठेवा, ४. आकाशमार्गाने जाणारा, ५. रावण, ६. पक्ष्यांच्या गतीने, ७. जागोजागी, ८. अती कठिण.

एका पर्वतावर पाच वानर बसलेले पाहून सीता उत्तरीय वस्त्रात अलंकार बांधून खाली टाकते : युद्धि सांगावया श्रीरामचंद्रा । भोवतें पाहे श्रीरामभद्रा[1] । पर्वतमाथां पंच वानरा । देखे सुंदरा दुरोनि ॥३३॥ श्रीरामाचे जीवप्राण । वानर होती पांचही जण । सीता जाणोनि संपूर्ण । वस्त्राभरण तेथें त्यागी ॥३४॥ वस्त्राभरणें वरिचेवरी । सीता सांडी हे नव्हे चातुरी । जाणोनि अवताराची थोरी । त्यागी सुंदरी शुद्ध्यर्थ ॥३५॥ पीतांबर कनकशोभा । दिव्यालंकारांची प्रभा । शुद्धि सांगावया निजवल्लभा । पद्मगर्भा स्वयें सांडी ॥३६॥ नीळ पीत आरक्त देखा । पहातसे मज सन्मुखा । वानरांमाजी तो माझा सखा । तो रघुकुळटिळका शुद्धि सांगो ॥३७॥ श्रीरामनामांकित खेवणें[2] । करमुद्रिका[3] करकंकणें । पीतांबरीं बांधोनि तिनें । शुद्धिकारणें[4] सांडिली ॥३८॥

ते अलंकार हनुमंताच्या हातात पडतात : सीतेने वरूनि सांडितां । तीं आलीं हनुमंताच्या हाता । तेणें वंदोनियां माथां । होय सांगता सुग्रीवा ॥३९॥ तंव सुग्रीव म्हणे हनुमंतासी । हें तू ठेवीं आपणापासीं । कैचें आले पां आकाशीं । विस्मयो त्यासी वाटत ॥४०॥ सभाग्यें भाग्य ज्याचे माथां । श्रीराममुद्रा ये त्याचे हाता । उल्हास हनुमंताच्या चित्ता । श्रीरामकार्यार्थी उद्यत[5] ॥४१॥

सीतेचा आक्रोश; हनुमंताचा संताप व उड्डाण : श्रीरामा वेगीं धांव पाव । ऐसा ऐकतां सीतारव[6] । मग अवघे वानर मानिती अपूर्व । जे नभीं कोण रव अनुवादे[7] ॥४२॥ श्रीरामनामामृतगोष्टी । उठती नभाचिये पोटीं । अवघे पाहती ऊर्ध्वदृष्टीं । परी वदतां दृष्टीं लक्षेना ॥४३॥ व्यक्ताक्षरें[8] ऐकों येती कानीं । परी वदता न देखों नयनीं । जरी मानूं आकाशवाणी । तरी आक्रंदोनि अनुवादत ॥४४॥ ऐकोनि सीताआक्रंदन । आलें हनुमंता स्फुरण । मग तिची करावया सोडवण । नभीं[9] उड्डाण करूं पाहे ॥४५॥ दोन्ही वळोनि वज्रमुष्टी । पाहे वटारिलिया दृष्टीं । रागें थरकत पुसाटी[11] । भूमी आपटी सक्रोध ॥४६॥ निर्दळावया दशवदन । काळाग्निरुद्र देदीप्यमान । सगळें गिळों पाहे गगन । भ्यासुर वदन भासत ॥४७॥ निवटावया[12] दशशिरा । दांत खातसे करकरा । रोम बाहु थरकती थरथरां । कोप वानरा अनिवार ॥४८॥

ते पाहून रावणाने तळात जाऊन लंकेत प्रवेश केला : करितां वानरे उड्डाण । गेले ध्रुवलोकासमान तंव तळीं पळाला रावण । सीता घेवोनि लंकेसी ॥४९॥ ऐसें हनुमंतें देखतां दृष्टीं । रावण भय घेवोनि पोटीं । समुद्राचें परतटीं । उठाउठीं पळाला ॥५०॥ जटायूपीस अति दारुण । येथेंही उठों पाहे विघ्न । तेणें धाकें पलायमान । लंकाभुवन ठाकिलें ॥५१॥

रावणाकडून सीतेला विवाहाबद्दल आग्रह, भावी सुखाची प्रलोभने : लंकेसी गेला लंकानाथ । हनुमंतें क्रोध केला शांत । लंका जाळीन निमेषांत । हें पोटांत दृढ धरिलें ॥५२॥ राक्षसधुरांचिया[13] कोडी । मारीन न लागतां अर्ध घडी । ऐसिया कोपाची चौघडी । शांतिबुडीं सांठविली ॥५३॥ तंव येरीकडे लंकानाथ । सीता मज जाली प्राप्त । येणें उल्लासें नाचत । येथें रघुनाथ केंवी पावे ॥५४॥ अति दुर्घट लंकागड । भोंवता समुद्राचा अगड[14] । न चले रामाची चरफड । मार्ग अवघड येथें यावया ॥५५॥ रावण सांगे सीतेप्रती । तुज म्यां आणिलें नभोगती[15] । श्रीरामलक्ष्मण पदाभिगती । कैसेनि येतीं यां ठाया ॥५६॥ क्रूर श्वापदें वनीं वसती । मार्गा दुर्घट पर्वतीं । दुस्तर सरितांचे[16] स्रोती[17] । केंवीं रघुपत येऊं पावे ॥५७॥ ऐसेनि

---

शब्दार्थ - १. हनुमंताला, २. जडिताचा अलंकार, ३. आंगठ्या, ४. रामाला आपला शोध लागावा म्हणून, ५. तयार, ६. सीतेचा शब्द, ७. बोलतो, ८. स्पष्ट शब्द, ८. आकाशात, १०. क्रोधयुक्त, ११. शेपूट, १२. मारण्यासाठी, १३. मोठमोठ्या पराक्रमी राक्षसांच्या, १४. खंदक, १५. आकाशमार्गानें, १६. नद्यांच्या, १७. प्रवाहात.

आलिया कष्टकोडी । दोघे मानवें बापुडीं । मज मारितां न लगे घडी । त्यांची गोडी तूं सांडीं ॥५८॥ त्या दोघांसी चारी भुजा । मज एकलिया वीस भुजा । मी मारीन श्रीरामराजा । निजपैजा जानकिये ॥५९॥ यापरी वो विचारितां । येथें न येववे श्रीरघुनाथा । तूं मज वरूनि आतां । राज्यभोगता सुखें भोगीं ॥६०॥ अनर्घ्यरत्नांचे अलंकार । वस्त्रें दिव्यें मनोहर । पदकमेखळा गंभीर । विचित्र हार मणिमय ॥६१॥ चंदन आणि कृष्णागरु । कस्तूरी कुंकुम केशरु । विलेपनें सुख अपारु । सुखसेजारु सुमनांचा ॥६२॥ दोघे बैसोनि विमानीं । क्रीडा करूं नंदनवनीं । अथवा लंकेचे भुवनीं । अशोकवनीं सुख भोगूं ॥६३॥ इंद्रादिक सुरवर । करीन तुझे आज्ञेचे किंकर । मंदोदऱ्यादि अंत:पुर[1] । त्या निरंतर तुझ्या दासी ॥६४॥ कायसी मृगाची कांचोळी । कंचुक्या लेई मुक्ताफळी । अर्धचंद्र लेईं तो भाळीं । मस्तकीं जाळी गजमुक्तां ॥६५॥ श्रीरामप्रिया भोगीं दशशिर । हा तुज ब्रीदाचा तोडर । रावणें हरिली सीता सुंदर । हा चरणीं गजर अंदुवांचा ॥६६॥ सीता रावणाची पट्टराणी । ऐसिया वांकी गर्जती चरणीं । ऐकोनि रावणाची वाणी । सीता संतापोनी बोलत ॥६७॥

**सीतेकडून रावणाचा धिक्कार, राम-रावणाची तुलना व त्याची निर्भर्त्सना :** मर मर निर्लज्जा दशशिरा । काय बोलतोसी चिकुरा[2] । तुजसारिखा निलाजिरा । जगीं दुसरा असेना ॥६८॥ स्वयंवरीं दावितां बळबंड । धनुष्यें दंडिलें वितंड । सभेंत जालें काळें तोंड । श्रीरामें कोदंड[3] भंगिता ॥६९॥ तैं न करिसीच माझें हरण । काळें वदन पलायमान । तूं तंव शूर्पणखेसमान । नाकेंवीण जल्पसी ॥७०॥ सदाचे तुझें काळें मुख । न राहवेचि रामासन्मुख । माझा धरोनि अभिलाख । मागों भीक आलासी ॥७१॥ भीक मागतां म्हणसी जननी । आणि आतां म्हणसी करीन पत्नी । तुजसारिखा मातृगमनी । आन त्रिभुवनीं असेना ॥७२॥ संन्यासी आणि चोरी करी । यतिधर्मीं आणि परद्वारी । हे तुजचि साजे गा थोरी । तूं नानापरी मातृगमनी ॥७३॥ करितां जटायूसीं रण । तुवां दांतीं धरिलें तृण । ज सांडोनि पलायमान । तेव्हां आंगवण[4] काय जाली ॥७४॥ घालितां श्रीरामाची आण । जटायु बोलिला सत्य वचन । तुवा कपटें करोनि छळण । घेतला प्राण जटायूचा ॥७५॥ माझा भोग भोगूं पाहे रावण । तेंही अधर्म्या अति दूषण । वायसां[5] विष्ठेचें भक्षण । आणि अमृतपान चकोरा ॥७६॥ तैसी सीता श्रीरामासी । रावणा उपभोग राक्षसी । अभिलाषितां जानकीसी । अनायासीं मरसील ॥७७॥ गजाचें जें आभरण । तें रासभा घालितां ये मरण । तैसी सीता अभिलाषितां रावण । कुळनिर्दळण पावेल ॥७८॥ सकळ रस सेवितां मासी । परी दीप चाखितां मरण तीसीं । तेंवी राज्य भोगितां रावणासी । सीताभिलाषीं प्राणांत ॥७९॥ स्तनपनींच्या अपत्या । उत्तम पक्वान्नें सेवितां । तें त्यासि न जिरे सर्वथा । तेंवी लंकानाथा जानकी ॥८०॥ जरी जालें अनर्घ्य[6] रत्न । तरी तें नव्हे शाळिग्रामासमान । तैसी सीता श्रीरामभोगायतन । ते दशानन कैंवी पावे ॥८१॥ ऐरावती बैसे इंद्र । तेथें बैसों जातां मरे खर । सीताभिलाषीं दशवक्त्र । सकुळगोत्र निमेल ॥८२॥ सुंदरा आरसा सुखरूप । तोचि सिमुरा[7] दावितां अति संताप । रावणाआंगीं सिमुरें[8] पाप । सीता सुखरूप त्या नव्हे ॥८३॥ ऐसिया नाना सवर्म युक्ती । रावणा निर्भर्त्सीं सीता सती । तेणें कोपला लंकापती । मग दूतांप्रती बोलत ॥८४॥

संदिश्य राक्षसान्घोरान्रावणोऽष्टौ महाबलान् । आत्मानं बुद्धिवैक्लव्यात्कृतकृत्यममन्यत ॥७॥

---

शब्दार्थ – १. जनानखान्यातील स्त्रिया, २. दुष्टा, ३. धनुष्य, ४. पराक्रम, ५. कावळ्यांना, ६. उत्तम, मूल्यवान, ७. नकट्याला, ८. व्यंग.

अप्रमादाच्च गन्तव्यं सर्वैरेव निशाचरैः । कर्तव्यश्च सदा यत्नो राघवस्य वधं प्रति ॥८॥

राक्षसांमाजी बळी संपूर्ण । कपटकर्मी अति प्रवीण । ऐसे बोलावोनि आठ जण । स्वयें रावण सांगत ॥८५॥ तुम्ही दुर्धर निशाचर । होवोनि जनस्थानीं एकत्र । रामवधार्थी निरंतर । अति सादर रहावें ॥८६॥

कपटकर्मप्रवीण अशा चौदा राक्षसांना रामांवर हल्ला करण्यासाठी पाठवितो : मारिलें त्रिशिरा दूषण खर । त्या रामा आणि आम्हां बद्धवैर[1] । तदर्थी तुम्ही आठही धीर । साधावें छिद्र[2] अति यत्नें ॥८७॥ सन्मुख युद्ध करितां त्यासीं । जिवें मारील समस्तांसी । यालागीं अति गुप्तवेंसीं । त्याचे वधासी साधावें ॥८८॥ मारूं जातां श्रीरघुनंदन । तुम्हांसी निर्दळील लक्ष्मण । एकेच वेळे दोघे जण । साधोन आपण वधावे ॥८९॥ निजले असतां वनीं । निदसुरे मारावे दोन्ही । कां आसनीं भोजनीं शयनीं । उदकपानीं साधावे ॥९०॥ पडल्या श्रीरामाचें दृष्टीं । मग जिण्याची कायसी गोष्टी । आठांचीही शिरें निवटी । शरवृष्टिप्रतापें ॥९१॥ यालागीं आपणां लपवोनी । जनीं विजनीं गमनागमनीं । सीताशुद्धि पाहतां वनीं । सिंतरोनी[3] मारावे ॥९२॥ छळें बळें कपटमेळें । दोघे मारावे एके वेळे । तदर्थी तुम्हीं प्रबळें । स्वकार्य समूळ साधावें ॥९३॥ मारिल्या रामलक्ष्मण । तुम्हांसी दिधलें जनस्थान । तेथें नांदावे आपण । ढोल निशाण लावोनी ॥९४॥

नंतर रावणाने अत्युत्तम सजविलेल्या रंगमहालात सीतेला नेली : ऐसें सांगोनिया त्यांसी । रावण आला सीतेपासीं । तीस न्यावया निजभवनासी । गृहें चौपासीं शृंगारिलीं ॥९५॥ गुढिया तोरणें विचित्र । मखरें शोभती मनोहर । सीता देखोनि मंदिर । मज अनुसरें तैसे करा ॥९६॥ रावणें हातीं धरोनि सीता । मंदिरें दाखवी अपूर्वता । दावोनि आपली समर्थता । अति एकांता आणिली ॥९७॥ पाहता कोणी न देखे दृष्टीं । आणि दुजयाची न पडे दृष्टी । ऐसिया एकांता गोरटी । उठाउठीं आणिलीं ॥९८॥

आत्मविश्वासी सीता निर्भयपणे महालात जाते : रावणासवें अति एकांता । निःशंक आलीसे सीता । हा मज झालिया झोंबता । लंकानाथा उपटीन[5] ॥९९॥ शुंभ निशुंभ चंडमुंड । जेंवी जगदंबा करी दुखंड । तेंवी रावणाचें बळबंड । खंडविखंड करीन मी ॥१००॥ श्रीरामसेवेचें धडफुडें । माझे अंगीं बळ गाढें । रावण दहा मुखाचें किडे । मजपुढें केवीं झोंबे ॥१॥ विसां भुजांतें वामकरें । दडपोनियां निजभारें । सकुंडल दाही शिरें । चमत्कारें खुडीन ॥२॥ याचीं छेदावया कंठनाळे[6] । कां लागलीं शस्त्रबळें । नखें खुडीन शिरकमळें । रावण केवळ तृण जैसें ॥३॥ आलिया इंद्रजित कुंभकर्ण । मारीन चडकणानें[7] हाणोन । कुमार सेना आणि प्रधान । निर्दळीन क्षणमात्रें ॥४॥ माझें लंकेसी आगमन । रावण निर्दळावया ससैन्य । तें एकांतीं फावलिया पूर्ण । भीड कोण राखील ॥५॥ श्रीरामसेवाफळ संपूर्ण । निर्दळावें द्वंद्व दारुण । तें ज्याचेनि नव्हे जाण । भक्तपण त्या नाहीं ॥६॥ सीता श्रीरामनिजशक्ती । ते केंवी आकळे[8] रावणाहातीं । येणें बळें सीता सती । आली एकांती निःशंक ॥७॥

सीतेचे अद्‌भुत सामर्थ्य लक्षात घेऊन रावण सीतेच्या पाया पडून भोगाची याचना करतो : सीता नाकळे निजबळें । हे रावणासी समूळ कळे । मग विषयाचे[9] प्रीतिमेळें[9] । चरणकमळें वंदिलीं ॥८॥

एतौ पादौ मया स्निग्धौ शिरोभिः परिपीडितौ । प्रसादं कुरु मे क्षिप्रं वश्यो दासोऽहमस्मि ते ॥९॥

इमाः शून्या मया वाचः शुष्यमाणेन भाषिताः । न चापि रावणः कांचिन्मूर्धा स्त्रीं प्रणमेत ह ॥१०॥

---

शब्दार्थ – १. हाडवैर, २. गुप्तकार्य, ३. फसवून, ४. कपट करून, ५. संहार करीत, ६. गळे, ७. थप्पड देऊन, ८. मिळेल, ९. विषयासक्तीने.

सीता आणोनी एकांता । रावणें चरणीं ठेविला माथा । मज विषयशरणागता[1] । कृपा तत्वतां करीं सीते ॥९॥ त्यजोनियां श्रीरघुनाथा । मज वरावें तुवां तत्वतां । माझी वाचा न करीं वृथा । शरणागता नुपेक्षी ॥११०॥ तुझीं वंदितां चरणकमळें । मस्तकीं लागलीं वो कोमळें । करस्पर्शनीं अति मवाळें[2]। मन कळवळे भोगार्थी ॥११॥ जिचे चरण सुखरूप । तिचें भोगितां स्वरूप । मज येईल सुख अमूप । कृपानुरूप वरीं मातें ॥१२॥ मी तंव अतिगर्वी रावण । ब्रह्मादि देवां नव्हें शरण । दानवमानवां पाड कोण । तो मी तुझे चरण वंदितों ॥१३॥ चरण वंदोनियां देख । होईन वशवर्ती[3] सेवक । अनुदिनीं तुझा आज्ञाधारक । कृपायाचक भोगार्थी ॥१४॥ सीतेचे चरण धरोनि हातीं । रावण येतसे काकुळती । मज अंगीकारीं भोगार्थी । तंव सीता सती हांसली ॥१५॥

अत्यंत तुच्छतेने झिडकारून सीता त्याचा उपहास करते : सुरवरां वंद्य श्रीरामचंद्र । त्यापुढें तुच्छ राक्षसेंद्र । सांडोनियां गजेंद्र । आरोहणा[4] खर तैसा तूं ॥१६॥ सांडोनिया अमृतपान । करावें काग-विष्ठाभोजन । तेंवी त्यजोनि श्रीरघुनंदन । तुच्छ रावण भोगावा ॥१७॥ सांडोनियां सत्संगती। बैसावें सूकराचे पंक्तीं । तेंवी त्यजोनियां श्रीरघुपती । रावण दुर्मती भोगावा ॥१८॥ कागाघरीं[5] श्राद्धविधान । तेथें विष्ठेने पितृतर्पण । तें न स्वीकारिती ऋषिजन । तें सेवन कागाचें ॥१९॥

त्यामुळे रावण क्रुद्ध होऊन तिला धमकी देतो व रामलक्ष्मण मेल्याचे खोटे सांगतो : ऐकोनि सीतेचें वचन । रावण कोपला दारुण । तुज श्रीरामाचें दर्शन । कल्पांतीं जाण हों नेदीं ॥१२०॥ तुज श्रीरामा नव्हेचि भेटी । तुज त्यांसी करों नेदीं गोष्टी । तुज श्रीरामा देखो नेदीं दृष्टीं । मी महाहट्टी रावण ॥२१॥ सीते ऐकें सावधान। तुज मी वधीन आपण । कां तुज मी कुजवीन । जंव तूं शरण मज येसी ॥२२॥ तज नेदीं अन्नपान । नेदीं अभ्यंगादि मर्दन । तुज नेदीं शय्या सुखासन । जंव तूं शरण मज येसी ॥२३॥ मस्तकीं जीव पडती भारी । वस्त्रें लागती वज्रापरी । तुज मी पीडीन तंववरी । जंव तूं अंतुरी होसी माझी ॥२४॥ पैल पाहे इंद्रजित कुंभकर्ण । कोट्यनुकोटी राक्षसगण । कुमार प्रधान अति दारुण । मशक कोण श्रीराम ॥२५॥ श्रीराम आणि लक्ष्मण। ते तेव राक्षसांचें भक्षण। तुझी कोण करील सोडवण । आग्रही पूर्ण तूं मूर्ख ॥२६॥ माझे राक्षसांहीं घालोनि घाला । राम लक्ष्मण गेला मेला । सीते अंगिकारीं मजला । सांडीं आपला दुराग्रहो ॥२७॥ पापभोगाचियें राशीं । वनीं कष्टलीसी रामा-सरिसीं। परम पुण्यें लंकेशासी। भोगीं सुखासीं जानकीये ॥२८॥ पाप असेल तुझिये माथां । तरि सांडिसील लंकानाथा । भोगूं म्हणती श्रीरघुनाथा । तरी तो सर्वथा निमाला[6] ॥२९॥

सीतेकडून पुनः निर्भत्सना : ऐकानि रावणाचें बोलणें । सीता हांसिली सत्राणें[7] । तूं मज भोगावयाकारणें । मरणा धरणें बैसलासी ॥१३०॥ पतंगें आकळितीं दीपासी । जळोनि मरे स्नेहसंगतीसीं । ते तुज दशा रावणासी । मद्द्रोगेंसीं मरणार्थ ॥३१॥

गतासुस्त्वं गतश्रीको गतसत्वो गतेंद्रियः । लंका वैधव्यसंयुक्ता त्वत्कृते न भविष्यति ॥११॥
स हि देवरसंयुक्तो मम भर्ता महाद्युतिः । निर्भयो वीर्यमाश्रित्य शून्ये वसति दंडके ॥१२॥
स ते वीर्यं बलं दर्पमुत्सेकं च यथाविधम् । व्यपनेष्यति गात्रेभ्यः शरवर्षेण संयुगे ॥१३॥

---

शब्दार्थ - १. भोगवासना पूर्तीसाठी शरण आलेल्याला, २. मृदू, २. आज्ञाधारक, ४. बसण्याला, ५. कावळ्याचे घरी, ६. मेला, ७. मोठ्याने.

रामबाणांनी तुझा समूळ संहार होईल असे सीता त्याला बजाविते : करितां परदारेची[१] चोरी । गेले आयुष्य यश कीर्ती श्री । लंकावैधव्याची परी । बैसेल निखरी तुझेनि ॥३२॥ मारिलें म्हणसी श्रीरघुनाथा । हे तंव तुझी मिथ्या वार्ता । श्रीराम काळाचा नियंता । ऐकें आतां सांगेन ॥३३॥ नेणसी श्रीरामाची थोरी । मृत्यु श्रीरामाची आज्ञा[२] वरी[२] । सकुळ मरण दशशिरीं । मग बोहरी[३] राक्षसां ॥३४॥ श्रीरामबाण अति तिखट । धाकें समुद्र देईल वाट । भेदील गिरि त्रिकूट । दाहीं कंठ छेदील ॥३५॥ इंद्रजित सबळ बळप्रवीण । क्षणार्धे मारील लक्ष्मण । कुमर वीर प्रधान सैन्य । घायें प्राण जातील ॥३६॥ निदसुरा कुंभकर्ण । रणीं हरवील नाक कान । लागतां श्रीरामाचा बाण । उभ्याच प्राण सांडील ॥३७॥ ऐसें बोलोनियां सीता । क्षोभें[४] पाहे लंकानाथा । त्यासी चळकांप सुटला चित्ता । दुर्धर दूतां पाचारी ॥३८॥

सीतेचा रुद्रावतार पाहून रावण घाबरतो व तिला अशोकवनात पाठवतो : म्हणे इर्सी भला नव्हे एकांत । क्षोभें करील माझा घात । विचारीं पडला लंकानाथ । कृतकार्यार्थ साधेना ॥३९॥ भोगिली न वचे बळात्कारीं । पायां पडल्या नांगीकारी । सीता पतिव्रता खरी । राज्यभोगावरी भुलेना ॥१४०॥ सीता सती पतिव्रता । सत्य मानले लंकानाथा । आपलीया निजस्वार्था । होय राखता जानकी ॥४१॥ त्रिजटा रावणाची भगिनी । गुज सांगे तिचे कानीं । सीता नेवोनि अशोकवनीं । सावधानी राखावीं ॥४२॥ अशोकवन ऐकतां गोष्टी । बांधी सीता शकुनगाठीं । शोक पळाला उठाउठीं । होईल भेटी श्रीरामा ॥४३॥ अशोकवन ऐकोनि कानीं । अशोकवन देखें नयनीं । अशोक श्रीरामहृदयभुवनीं । सीता तत्स्थानीं राखिली ॥४४॥ सीता राखिली अशोकांत । अशोकामाजी श्रीरघुनाथ । तीपासीं असे तो सतत । सावधानार्थ सुखरूप ॥४५॥ एकाजनार्दना शरण । सीता प्रवेशली अशोकवन । अशोकीं नाहीं शोकबंधन । सीता तें स्थान पावली ॥१४६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां सीताशोकवनप्रवेशो नाम अष्टादशोऽध्याय ॥१८॥ ओव्या ॥१४६॥ श्लोक ॥१३॥ एवं ॥१५९॥

## अध्याय एकोणिसावा

### श्रीरामांचा सीताशोक

सीतेवर राक्षसिणींचा पाहारा असतो त्याचे वर्णन : श्रीसच्चिदानंदायनमः । अशोकवनीं सीतेपासी । दुष्ट दुर्धर राक्षसी । रावण ठेवी भेडसावयासी । भयें आपणासी वश होईल ॥१॥

**अशोकवनिकामध्ये मैथिली नीयतामिति । तत्रेयं रक्ष्यतां गूढं युष्माभिः परिवारिता ॥१॥**

सीतासंरक्षणीं नित्यवासी । विकटा विकृता समयेंसी । विरूपा विक्राळा राक्षसी । अशोकवनासी त्या आल्या ॥२॥ नानारूपा नानाकारा । विक्राळा कराळा[५] अति उग्रा । भिंगुलवण्या[६] भयासुरा । आल्या समग्रा सीतेपासीं ॥३॥ एकीचें विक्राळ वदन । सर्वांगासी एकचि कान । तीसी कानचि आच्छादन । येरवीं नग्न कराळी ॥४॥ लागतां कानाचा फडकारा । नक्षत्रें पडती जैशा गारा । जयाचें भय सुरसुरां । सीतेसी भेदरा देऊं आल्या ॥५॥ एकींचे उटकंटक[७] कपाळा । थडक हाणिती लोकपाळां । कपाळावरी विकट डोळा । जनकबाळा छळूं आल्या ॥६॥ एकींस एक कान आंथरूण । दुसरा कान तो प्रावरण[८] । कानें कांपती त्रिभुवन । सीतेसी छळण करूं आल्या ॥७॥ एकी स्तनायुधा दुर्धरा[९] । एकैक थान

---

शब्दार्थ - १. दुसऱ्याच्या स्त्रीची, २. आज्ञा पाळतो, ३. नाश, ४. क्रोधाने, ५. भयानक, ६. भयासुर, धिप्पाड, ७. उभारलले केस, ८. पांघरूण, ९. धरण्यास कठिण.

गांवें बारा । स्तनघातें मारी असुरां । सीतेसी भेदरा देऊ आली ॥८॥ भ्यासुर मुख दीर्घ दांताळी[१] । दांतीं दिग्गजां करी रांगोळी । वीर निर्दाळी दांतांतळीं । सीतेजवळी भय दावी ॥९॥ एकीचे केश सलंव पूर्ण । तेंचि नेसणें तेंचि पांघरूण । केश तिखट जैसे बाण । केशाभेणें जग पळे ॥१०॥ अजामुखी गजमुखी । सिंहश्वानशूकरमुखी । व्याघ्रवानरतरसमुखी । घोडमुखी विक्राळा ॥११॥ खरोष्ट्रवक्त्रा सलंब ओष्ठ । होटें प्राण्याचा भरिती घोट । अवघ्या आलिया सीतेनिकट । भय उद्भट दावावया ॥१२॥ विक्राळ मुख दीर्घ चांभाडी । कंटकी जिव्हा तांबडी । ते देखतां प्राणी प्राण सांडी । भक्षी मर्डी राक्षसांचीं ॥१३॥ राक्षस भक्षिती मनुष्यांसी । विक्राळा भक्षिती राक्षसांसी । तिसी रावण धाडी सीतेपासी । भयें आपणासी वरावया ॥१४॥ वांकडें मुख दीर्घ नाक । तेंही लांबवावें विशेख । जिचे श्वासावर्ती जग देख । शतानुशतक तळमळत ॥१५॥ नाकींचिया केसांआंत । म्हैसे गुंतले ओरडत । सिंह गुंतले तडफडित । गजावर्त[२] विकटास्या[३] ॥१६॥ नखायुधा क्रूरमुख । सलंब नखें अति तिख[४] । तींही लांब क्रोश एक । इंद्रादिक कांपती ॥१७॥ नखाघात[५] अति उद्भट । घायें शस्त्र करी पीठ । नखें पर्वत करी सपाट । दुर्धर दुष्ट नखायुधा[६] ॥१८॥ एकपादा आणि त्रिपादा । पंचपादादि हस्तपादा । शस्त्रास्त्रीं सन्नद्धबद्धा । आलिया उन्मादा राक्षसी ॥१९॥ वाल्मीकरामायणाप्रती । राक्षसी बोलिल्या आहेत बहुती । तो विस्तारु न धरवे हातीं । कथा ग्रंथीं वाढेल ॥२०॥ पुढील कथेची संगती । कृपा करावी साधुसंती । स्वयें रावण राक्षसींप्रती । काय उपपत्ति बोलिला ॥२१॥

तथा च तर्जनैर्घोरैः पुनः सांत्वेश्च मैथिलीम् । आनयध्वं मम वशे वन्यां गजवधूमिव ॥२॥

रावण सांगे राक्षसींसी । दुर्धर भेडसावा सीतेसी । गर्जन तर्जन[८] अति आवेशीं । अट्टहासेंसीं गर्जोनी ॥२२॥ ऐसें करावें गर्जन । तिचें चळकांपे मन । अत्यंत होवोन उद्विग्न । मूर्च्छापन्न भयभीत ॥२३॥ सुखें वरीन मी रावण । ऐसें बोले जंव आपण । तंववरी भय दाविजे संपूर्ण । जंव शरण मज होय ॥२४॥

**सीतेला भीती निर्माण करण्याची राक्षसिणींना आज्ञा :** मज आलिया अनन्यशरण । तिसी करावें सुखशांतवन । सीते तुझें भाग्य धन्य । जे दशानन तुज कांत ॥२५॥ ऐसें सांगोनि तयांसी । धाडिल्या अशोकवनासी । वश जालिया सीतेसी । आणावी गजरेंसीं मजपासीं ॥२६॥ मग राक्षसी मिळोनि समस्ती । कोइत्या मुद्गल त्रिशूळ हातीं । आल्या अशोकवनाप्रती । हाक देती दुर्धर ॥२७॥ हाकीं गर्जलें अंबर[९] । स्वर्गीं कांपती सुरवर । भूतळीं गर्जती नर किन्नर । ऋषीश्वर भयभीत ॥२८॥ राक्षसी करिती दीर्घ रवो । सीता मारोनि मांस खावों । तुझें कंठीचें रुधिर[१०] पिवों । आणि हार लेवों[११] हाडांचे ॥२९॥ तुझें सर्वांगचिया शिरीं । करूं शेवयांची खिंरी । काळी काढोनि बाहेरी । कोशिंबिरी करूं आम्ही ॥३०॥ ऐशिया गर्जती राक्षसी । अवघ्या आल्या सीतेपासीं । तंव तें भय भासेना सीतेसी । श्रीरामस्मरणें निःशंक ॥३१॥ देखतां सीतेचें दर्शन । राक्षसी झाल्या कंपायमान । सीतेनें पाहिल्या क्षोभोन । आमचा प्राण घेईल ॥३२॥ सीता देखतांचि दृष्टी । भयें पळाल्या उठाउठीं । राक्षसी भयभीत पोटीं । गोष्टी उफराटी येथें जाली ॥३३॥

**सर्व प्रयत्न वाया गेल्यामुळे दुःख :** भेडसावूं जातां सीतेसी । भयभीत जाल्या राक्षसी । श्रीरामस्मरणाची महिमा ऐशी । द्वंद्व[१२] भक्तांसी बाधीना ॥३४॥ मग रावणा सांगती निशाचरी ।

---

शब्दार्थ – १. दंतपंक्ती, २. हत्तीप्रमाणे मंडळाकार, ३. भयंकर तोंडात, ४. तीक्ष्ण, ५. नखांचा प्रहार, ६. नखें हींच ज्यांची शस्त्रे आहेत अशा, ७. युक्ती , ८. शिव्या देणे, ९. आकाश, १०. रक्त , ११. गळ्यात घालू, १२. सुखदुःखादि विकार.

सीता आमुचें भय न धरी । आम्हां सीतेचे भय भारी । सर्वांपरी निःशंक ॥३५॥ तंव रावण म्हणे सती सीता । निःशंक निथडी[1] पतिव्रता । हे मज भोगवेना सर्वथा । कष्ट वृथा गेले माझे ॥३६॥

राम व लक्ष्मण आश्रमाकडे येतेवेळी त्यांना मार्गांत अपशकुन होतात : तंव येरीकडे[2] श्रीराम सौमित्र । दोघे होवोनि एकत्र । आश्रमीं एकली सीता सुंदर । दोघे सत्वर निघाले ॥३७॥

व्रजतस्तत्र तस्याथ वामलोचनमस्फुरत् । प्रास्फुरच्चास्खलद्रामो वेपथुश्चास्य जायते ॥३॥

उपालभ्य निमित्तानि सोऽशुभानि मुहुर्मुहुः । अपि सीताश्रमे सा स्याद्व्याजहार पुनःपुनः ॥४॥

सीतेचे भेटीस जातां जाण । अशुभ लवें वाम[3] नयन । पदोपदीं रघुनंदन । अडखळे आपण क्षणक्षणां ॥३८॥ सौमित्रा ऐकें सावधान । अशुभ होताती अपशकुन । आजि सीतेचें दर्शन । केंवी देखों हें न कळे ॥३९॥ लक्ष्मणा एकली सीता । आश्रमीं असेल काय आतां । वारंवार होय पुसता । प्रबळ चिंता सीतेची ॥४०॥

आश्रमात सीतेला एकटी ठेवून आल्याबद्दल लक्ष्मणाला दोष : आश्रमीं एकली सीता सांडोनी । कां येथें आलासी धांवोनी । हरोनि नेतां राक्षसीं पत्नी । कोण तिजलागोनी सोडवील ॥४१॥ स्त्रियेच्या क्षुद्र बोलासाठीं । त्वां कां रागें सोडिली पंचवटी । सीता हरील रावण हट्टी । बुद्धि खोटी तुवां केली ॥४२॥ अशुभ होताती अपशकुन । तेणें मी अत्यंत उद्विग्न । सीता मागुती देखेन । हें सहसा मन मानीना ॥४३॥

ददर्श पर्णशालां च सीतया रहितां तदा । श्रिया विरहितां ध्वस्तां हेमंते पद्मिनीमिव ॥५॥

रुदंतमिव वृक्षैश्च ग्लानपुष्पमृगद्विजम् । श्रिया विहीनं विध्वस्तं संत्यक्तं वनदेवतैः ॥६॥

पंचवटीत कोठेच सीता आढळेना म्हणून सर्वत्र शोधाशोध : ऐशा मार्गी करिता गोष्टी । दोघे आले पंचवटीं । सुंदर कपाळेशानिकटीं । सीता गोरटी दिसेना ॥४४॥ शोधोनि पाहिली पंचवटी । शोधिली उभय गंगातटीं । वनीं धुंडितां परम कष्टीं । जालें जगजेठी अति श्रांत ॥४५॥ दोघे आले पंचवटीं । तंव रिती दिसे पर्णकुटी । जनीं वनीं हिंडतां दृष्टी । सीता गोरटी दिसेना ॥४६॥ जरी शुद्धि पुसावी ऋषिजनीं । तरी ते पळाले जीव घेवोनी । मनुष्यमात्र न दिसे वनीं । तंव लक्ष्मण मनीं धाकतु ॥४७॥ श्रीराम धाकत होता पोटीं । तेचि येथें घडली गोष्टी । अपेशपात्र जालों सृष्टीं । लक्ष्मणापोटीं अति चिंता ॥४८॥ लक्ष्मणें हारविली सीता । हें अपेश बैसलें माथां । काय मी सांगों रघुनाथा । शोधितां सीता दिसेना ॥४९॥ शुद्धि पुसों जातां वनीं । तंव वृक्ष खांकरले[4] फळपुष्पांनीं जेंवी अंतरल्या जननी । दीनवदनी अपत्यें ॥५०॥ वृक्ष स्रवती संपूर्ण । पशु पक्षी करिती रुदन । वनश्री गेली पळोन । अवदशा पूर्ण वना आली ॥५१॥ पक्षिणी पडल्या पारधियाहातीं । पिलीं चरफडती फडफडितीं । तेंवी नेलिया सीता सती । जाली उपहती[6] आश्रमी ॥५२॥ सीतेचेनि दुःखें जाण । सर्वांगीं द्रवती पाषाण । थेंबटे गाळों लागलें तृण । दुःख दारुण सर्वांसी ॥५३॥ ऐसी देखोनि उपहती । श्रीराम सुखावला चित्ती । करावया अवतारख्याती । निजपुरुषार्थी उद्यतु[7] ॥५४॥

रामाचा अनावर क्रोध : सज्ञान माझी सीता सती । जे ससैन्य रावणवधार्थी । स्वयें गेली लंकेप्रती । राक्षसां ख्याती लावावया ॥५५॥ समुद्रीं तारून पाषाण । मारीन रावण कुंभकर्ण । श्रीरामा आले स्फुरण । कुळनिर्दळण राक्षसांचे ॥५६॥ मारोनि राक्षसांच्या

शब्दार्थ – १. धैर्यवान, २. इकडे, ३. पुरुषांचा डावा डोळा लवणे हा अपशकुन समजतात. ४. भ्याला, ५. फळांच्या व पानांच्यायोगे करून शब्द केला, ६. औदासीन्य, ७. प्रवृत्त.

कोडी । सोडवीन देवांची बांधवडी । रामराज्याची निजगुढी । जगीं रोकडी उभवीन ।।५७।। ऐसा श्रीराम सर्वज्ञ । जाणोनि भविष्याचें ज्ञान । सीताशुद्ध्यर्थ आपण । भ्रमलेपण स्वयें दावी ।।५८।। जैसी अवताराची गती । तैसी अवताराची स्थिती । श्रीराम निघाला तैसियां रीतीं । सीताशुद्ध्यर्थी विलपत ।।५९।। श्रीराम अवतार सुनिश्चित । त्यासीही लोकसंग्रहार्थ[1] । वसिष्ठें नेमिला परमार्थ । तेंचि रघुनाथ संपादी ।।६०।।

अंतरेको बहिर्नाना अंतर्बोधो बहिर्जडः । अंतरस्त्यागी बहिःसंगी लोके विहर राघव ।।७।।
बहिः कृत्रिमसंरंभो हृदि संरंभवर्जितः । अकर्ता च बहिःकर्ता लोके विहर राघव ।।८।।
अंतर्नैराश्यमादाय बहिराशोन्मुखो हि वा । बहिस्तप्तोंऽतराशीतो लोके विहर राघव ।।९।।

श्रीरामांची मानसींची भूमिका : अंतरीं जाणोनी परब्रह्म । बाह्य सीतार्थी विरहभ्रम । अंतरीं स्वतःसिद्ध निष्काम । बाह्य दुःखधर्म सीताशुद्धि ।।६१।। अंतरीं अद्वैतप्रतीती । बाह्य सीता पुसे जीवांप्रती । वृक्षवल्लींस ये काकुळती । सीता निश्चितीं मज सांगा ।।६२।। अंतरीं निजबोध अति गोड । बाह्य सीतादुःखें अति जड । अंतरीं निर्विषय सुरवाड[2] । बाह्य धुमाड[3] विषयांचा ।।६३।। अंतरीं अद्वैत्वें सर्वत्यागू । बाह्य सीतेसीं विषयसंगू । अंतरीं सुनिश्चित चांगू । बाह्य लगबगू धांवण्या धांवे ।।६४।। अंतरीं अणुमात्र नाहीं चाड । बाह्य सीतार्थीं अति चरफड । अंतरीं निजसुखसुरवाड । बाह्य दुर्वाड[4] अति दुःखी ।।६५।। अंतरीं नित्य नैराश्य । बाह्य सीतेचा आशापाश । तिचेनि दुःखें अति संत्रास । पिशाचभास जगीं दावी ।।६६।। अंतरीं संतापनिवृत्त[5] । बाह्य संतापें अति संतप्त । अंतरीं सर्वार्थनिर्मुक्त । बाह्य विषयासक्त सीतार्थी ।।६७।। अंतरीं भूतकृपा चोखडी । बाह्य युद्धार्थ पुरुषार्थपरवडी । मारोनि राक्षसांच्या कोडी । गजकरवडी पाडितु ।।६८।। अंतरीं बोध अकर्त्रात्मता । बाह्य दिसे युद्धकर्ता । मारोनि राक्षसां समस्तां । लंकानाथा निर्दळील ।।६९।। सद्गुरु वसिष्ठाचे युक्तीं । श्रीराम वर्ते निजात्म-स्थितीं । हें न कळे लोकांप्रती । श्रीराममूर्ति परब्रह्म ।।७०।। वाल्मीकमुनीचें भाषित । सत्य करावया श्रीरघुनाथ । विलपत[6] सीताशुद्ध्यर्थ । स्वयें बोलत तें ऐका ।।७१।। श्रीराम म्हणे लक्ष्मणासी । वेगीं बोलावीं सीतेसी । माझी आज्ञा कां न मानिसी । तुज काय तिसीं अबोला ।।७२।। तूं त्वं सीतेसीं क्षोभलासी । रागें तिसीं न बोलसी । तरी मीच पाचारितों तिसी । अतिसंभ्रमेंसीं[7] अनुवादे ।।७३।।

किं धावसि प्रिये दूरं दृष्टासि कमलेक्षणे । वृक्षेणावृत्य चात्मानं कस्मान्न प्रतिभाषसे ।।१०।।
तिष्ठ तिष्ठ वरारोहे न तेऽस्ति करुणा मयि । नात्यर्थं हास्यशीलासि किमर्थं मामुपेक्षसे ।।११।।

सीतेसाठी शोक व करुणार्द्र चित्त : मी तुज देखतो वो सुंदरी । तूं कां पळतेसी दुरिचे दुरी । रिघोनि वृक्षगुल्मांमाझारीं । नेत्रोंतरीं कां लपसी ।।७४।। उभी वो राहें येथें । तूं जाशील जेथें जेथें । मी येईन तुजसांगातें । सांडोनि मातें जाऊं नको ।।७५।। मृगकंचुकीसाठीं । मजसीं रुसलीसी गोरटी । मज न देसी दृष्टिभेटी । माझी गोष्टी कां नाइकसी ।।७६।। माझे सेवेची तुज आवडी । मज न विसंबसी अर्धघडी । तें तू आजि कडोविकडीं[8] । वृक्षाबुडीं कां लपसी ।।७७।। मृग मारोनि मज येतां । विलंब लागला तत्वतां । तेणें क्षोभ जाला चित्ता । क्षमा सर्वथा मज करीं ।।७८।। लक्ष्मण न करी तुझें वचन । तेणें जालीस क्षोभायमान । तदर्थीं माझें लोटांगण । क्षमा पूर्ण मज करीं ।।७९।। कृपेनें मज द्यावी भेटी । सांगें जीवींची गुजगोष्टी ।

---

शब्दार्थ – १. लोकांच्या कल्याण्याकरिता, २. आनंद, ३. विपुलता, ४. अनिवार, ५. संतापापासून मुक्त, ६. शोक करीत, ७. मोठ्या आवेशाने, ८. मोठ्या कडाक्याने.

तूं एकाकी गोरटी । वन दिक्पुटीं कां जासी ॥८०॥ तुजलागीं मी आर्तभूत । तुझें कां वो निष्ठुर चित्त । कृपेनें येवोनियां येथ । माझे आर्त[1] पुरवावें ॥८१॥ ऐसेनि न भेटे निजकांता । वृक्षवल्लीतें होय पुसतां । पशुपक्ष्यादि समस्तां । पुसे सीता श्रीराम ॥८२॥ तुम्ही न बोला सकोपता[2] । तुमचे चरणीं माझा माथा । केउती[3] आहे माझी सीता । मज तत्वतां सांगावी ॥८३॥ देखोनि पर्वत पाषाण । श्रीराम घाली लोटांगण । तुम्हीं तरी कृपा करून । सांगावी आपण सीताशुद्धि ॥८४॥ ऐसी न देखतां सीता । श्रीरामासी परम चिंता । लक्ष्मणासी होय सांगता । गता मृता जानकी ॥८५॥

अब्रवील्लक्ष्मणं दीनो मुखेन परिशुष्यता । हता मृता गता सीता भक्षिता वा तपस्विनी ॥१२॥

वाटेत सीतेचा शोध व रामांचा विलाप : श्रीराम म्हणे सीता एकली । राक्षयभयें पळोन गेली । किंवा आपभयें निमाली । अथवा मारिली राक्षसी ॥८६॥ राक्षसीं सीता मारून । स्वेच्छा केलें भक्षण । ऐसें बोलोनि रघुनंदन । मूर्च्छापन्न अति दुःखी ॥८७॥ सीता सीता म्हणतां वेळोवेळां । वाळले ओंठ सुकला गळा । अश्रु पूर्ण आले डोळां । जनकबाळ केउती आहे ॥८८॥ मूर्च्छापन्न मूर्च्छेआंत । हाय हाय सीता म्हणत । सीताविरहें श्रीरघुनाथ । दुःखाभिभूत अति दुःखी ॥८९॥ पडे अडखळे उठे बैसे । सीता सीता म्हणे आवेशें । सीताविरहें लागले पिसें । क्षणक्षणां पुसे जानकी ॥९०॥

क्व गता मां परित्यक्त्वा हा सीतेति पुनः पुनः । इत्येवं विलपन्रामः पर्यधावद्वनाद्वनम् ॥१३॥

क्वचिदुद्भ्रमते योगात्क्वचिद्विभ्रमते बलात् । क्वचिनमत्त इवाभाति कान्तान्वेषणतत्परः ॥१४॥

क्वचित्स्खलन्क्वचिद्वीक्षन्क्वचिद्धावन्क्वचित्पतन् । उच्चैर्नीचैश्च विक्रोशन्सीता सीतेति वा वदन् ॥१६॥

चराचर सृष्टीलाच सीतेविषयी पृच्छा : आतां काय सीतेची आशा । म्हणोनि धांवे दाही दिशा । सीतेलागीं झाला पिसा । अति आक्रोशें विलपत ॥९१॥ हा हा सीते हा हा सीते । म्हणोनि पाहे सभोवतें । न देखोनियां सीतेतें । वनीं वनातें परिभ्रमे ॥९२॥ कोठे अडखळे कोठे उडे । कोठे रडे कोठें पडे । सीताविरहें जालें वेडें । पाहे चहूंकडे जानकी ॥९३॥ सीता सीता म्हणोनि देखा । अति आक्रोशें मारी हाका । लक्ष्मणा तूं माझा सखा । उगाचि तूं कां पाहतोसी ॥९४॥ सीते वेगीं तूं धांव पाव । अति संभ्रमेंसीं[5] देई खेंव[6] । मी गर्जोनि घेतों नांव । माझी करुणा कां हो नुपजेचि ॥९५॥ कां रुसलीस सांगातिणी । म्हणोनि आंग टाकी धरणीं । सर्वेंचि धांवे उन्मत्तपणीं । वनीं काननीं गिवसित[7] ॥९६॥

तस्य शैलस्य सानूनि गुहाश्च शिखराणि च । प्रयत्नेन विचिन्वतौ नैव तामधिजग्मतुः ॥१६॥

विचिंत्य सर्वतः शैलं रामो लक्ष्मणमब्रवीत् । न तां पश्यामि सौमित्रे वैदेहीं पर्वते शुभाम् ॥१७॥

दऱ्या दरकुटें पर्वतशिखरें । गिरिगव्हरें गुहाकंदरें । शोधितां श्रीरामसौमित्रें । सीता सर्वत्र दिसेना ॥९७॥ श्रीराम म्हणे सौमित्रासी । शोधितां पर्वत देशोदेशीं । सीता न भेटे आम्हांसी । शुद्धि कोणासी पुसावी ॥९८॥ शुद्धि पुसावया जाण । हें केवळ वन विजन[8] । शोधितां न भेटे जन । काय आपण करावें ॥९९॥ ऐसें बोलतां श्रीरघुनाथा । सीताविरहें संभ्रांतता । पुसों धांवे तो पर्वता । पर्वतमाथां वृक्षांसी ॥१००॥

रे वृक्षाः पर्वतस्था गिरिगहनलता वायुना वीज्यमाना रामोऽहं व्याकुलात्मा दशरथतयः शोकवृत्तश्च दग्ध । बिंबोष्ठी चारुनेत्रा सुविपुलजघना बद्धरत्नाढ्यकांची । हा सीता केन नीता मम हृदयगता को भवान्केन दृष्टा ।

---

शब्दार्थ - १. इच्छित, २. रागवून, ३. कोठे, ४. दुःखाने व्यापलेला, ५. आदराने, ६. आलिंगन, ७. शोधीत, ८. निर्जन.

पर्वताग्रीं वृक्ष हो । तुम्हीं दुरीं देखतां पहाहो । तरी माझ्या हृदयींचा संदेहो । निःसंदेहो तुम्ही करा ॥१॥ म्हणाल तूं कोण कोणाचा । तरी मी राम दशरथाचा । सीतावियोग-विरहाचा । अति दुःखाचा पर्वत ॥२॥ सीता म्हणाल आहे कैसी । तिचिया निजस्वरूपासी । मी सांगेन तुम्हांपासीं । यथार्थेसीं[१] सुचिन्हें ॥३॥ आरक्त नेत्र आरक्त अधर[२] । सुंदर सुनासिका सुकुमार । कटीं रत्नाढ्य कटिसूत्र । पीतांबरधर जानकी ॥४॥ ऐसिया लावण्याची खाणी । तुम्हांमाजी देखिली कोणीं । ते सांगावी मजलागोनी । तिची धांवणी मी करीन ॥५॥ वायूनें वृक्षपल्लव डोलती । श्रीराम म्हणे मज वृक्ष बोलाविती । ऐसें म्हणोनियां तयांप्रती । धांवोनि वेगवृत्तीं[३] स्वये जाय ॥६॥ तेथें न भेटतां सीता । परम दुःख श्रीरघुनाथा । मूर्च्छित पडे मागुता । हा हा सीता विलपत ॥७॥ सीता न सांगती पर्वत । तेणें क्षोभला श्रीरघुनाथ । भस्म करावया गिरि समस्त । धनष्या हात घातला ॥८॥ धनुष्या लावोनियां गुण । गुणीं लाविला वज्रबाण । तंव लक्ष्मणें धरिले चरण । विरुद्ध आपण न करावें ॥९॥ निरपराध हे पर्वत । यांचा करूं नये घात । शांत करोनि श्रीरघुनाथ । पुढें वनांत चालिले ॥११०॥

इमे लक्ष्मण वैदेह्यास्तपनीये विभूषणे । जपापुष्पनि काशैश्च चित्रक्षत जबिन्दुभिः ॥१९॥
मन्ये लक्ष्मण वैदेही राक्षसैः कामरूपिभिः । नीत्वा छित्वा विभक्ता वा भक्षिता वा तपस्विनी ॥२०॥

मार्गात सोन्याचा अलंकार दिसतो : मार्गी जातां रघुनंदन । देखे सीतेचें सुवर्णभूषण । लक्ष्मणा धांव म्हणोन । सीता येणें मार्गे नेलीसे ॥११॥ आतां माग लागला खरा । धांवणें करूं सौमित्रवीरा । तंव रक्तांकित देखोनि धरा[४] । श्रीरामचंद्रा अति चिंता ॥१२॥ कपटरूपें राक्षसीं । येथवरी आणोनि सीतेसी । छेदोनी मारोनी तिसी । विभागेंसीं भक्षिली ॥१३॥ गेलें सीतेऐसें रत्न । अति दुःखित श्रीरघुनंदन । तंच पुढें देखतसे आपण । महारण वीरांचें ॥१४॥

रपोपकरणं सर्व विध्वस्तं धरणीतले । मुक्तामणिनिभं दिव्यं तपनीयविभूषितम् ॥२१॥
पतितं भुवि पश्य त्वं भ्रातः सौम्य महाद्भुतम् । विशालं पतितं भूमौ कवचं यस्य कांचनम् ॥२२॥

जरासे पुढे चालून गेल्यावर मोडलेले धनुष्य, रथ, छत्र, भाता व बाण इत्यादी आढळते : ते रणभूमी[५] अवलोकिंता नयनीं । धनुष्य भंगिले हेमाभरणी[५] । कवच पाडिलें दिसे धरणीं । मुक्ताभरणीं लखलखित ॥१५॥ रथ भंगिला सचक्र । मारिले पिशाचवदन चर । दंडभंगें पाडिलें छत्र । युद्ध विचित्र वीरांचें ॥१६॥ सतूणीर[६] विखुरलें[७] बाण । मुकुट पाडिला देदीप्यमान । थोर जाले रणकंदन । सीता संपूर्ण मारिली ॥१७॥ सीता अतिशयें सुंदर । नितनिमित्त निशाचर । भिडिन्नलें परस्पर वीर । युद्ध दुर्धर तयांचे ॥१८॥ ऐसिया युद्धसंकटीं । सीता मारिली गोरटी । राक्षस तंव महाकपटी । मांसासाठीं मारिली ॥१९॥ सीता मारिली राक्षसीं । काय मुख दावूं अयोध्येसी । काय सांगों जनकापासीं । क्षत्रियधर्मासी हे लाज ॥१२०॥

किंनु लक्ष्मण वक्ष्यामि समेत्य जनकं वचः । मातरं चैव वैदेह्या विनतामहमप्रियम् ॥२३॥

काय सांगों सीतेचे मातेसी । काय सांगों निजजनन्यांसी । सीता हरविली वनवासीं । काय सुहृदांसी मी सांगों ॥२१॥ लाज लागली यशःकीर्तींसी । लाज लागली क्षात्रवृत्तीसी । लाज लागली मज मानसीं । सीता वनवासीं हरविली ॥२२॥ लाजविला निजपुरुषार्थ । स्वर्गी लाजेल श्रीदशरथ । लाज जाली तिहीं लोकांत । तेणें श्रीरघुनाथ क्षोभला ॥२३॥

---

शब्दार्थ – १. बरोबर, २. ओठ, ३. मोठ्या त्वरेने, ४. पृथ्वी, ५. सुवर्णालंकारयुक्त, ६. भात्यासकट, ७. पसरले.

सुमित्रा पाहें आंगवण । म्हणोनि घेतलें धनुष्यबाण । सीतेनिमित्त पैं जाण । बाणें निर्दळीन तिन्ही लोक ॥२४॥

तमुवाच ततो रामश्चित्रं विस्फार्य कार्मुकम् । अराक्षसीमिमां लंकां जगत्पश्याद्य लक्ष्मण ॥२४॥

सीतेला राक्षसांनीच पळविले अशा भावनेने श्रीरामांना आलेला क्रोध व त्याचे आविष्करण : राक्षसीं नेलिया सीता सुंदरा । सकुल सपुत्र सपरिवारा । अराक्षसी करीन धरा । शरधारा निवटोनी[1] ॥२५॥ सीता पाताळीं नेतां जाण । पन्नगांतें निर्दाळीन । दानवमानवातें विंधीन । घोळसीन त्रिदशातें ॥२६॥ राक्षसीं मारिली सीता । तिसी जरी यम होय नेता । त्याचे करीन मी घाता । यमदूतासमवेत ॥२७॥ यम दंडितो जगासी । बाणीं मीं दंडीन त्यासी । आणूनि नेदी जरी सीतेसी । तरी मी त्यासी दंडीन ॥२८॥ यमाची मी नळीं[2] निमटीं[3] । कळिकाळाची फोडीन कवटी । दमूनियां सकळ सृष्टी । सीता गोरटी आणीन ॥२९॥ मी तंव काळाचा आकळिता[4]। अंतकातें निर्दळिता । मर्दोनि लोका समस्तां । आणीन सीता निमेषार्धे ॥१३०॥ नयनाग्नीचें कल्लोळ । नेत्रींहूनि निघती ज्वाळ । धनुष्य ओढिलें विक्राळ । स्वर्गीं खळबळ देवांसी ॥३१॥ देव दानव ऋषीश्वर । भेणें[5] कांपती थरथर । आंदोळलें चराचर । श्रीराम दुर्धर क्षोभला ॥३२॥ सीतेचिया शुद्धीसाठीं[6] । क्रोधें जाळूं पाहे सृष्टी । भयें उमा झोंबे कंठीं । धाके पोटीं सदाशिव ॥३३॥

अदृष्टपूर्वं सङ्क्रुद्धं दृष्ट्वा रामं सलक्ष्मणः । अब्रवीत्प्रांजलिर्वाक्यं मुखेन परिशुष्यता ॥२५॥
पुरा भूत्वा मृदुर्दान्तः सर्वभूतहिते रतः । न क्रोधवशमापन्नः प्रकृतिं हातुमर्हसि ॥२६॥
चंद्रे लक्ष्मीः प्रभा सूर्ये गतिर्वायौ भुवि क्षमा । एतश्च नियतं नित्यं त्वयि चानुत्तमं यशः ॥२७॥

लक्ष्मणाने क्रोध शांत केला : श्रीराम काळाग्निरूप क्रोधायमान । तें देखोनि धाके लक्ष्मण । तोंडींचे पाणी गेलें पळोन । कंपायमान भयभीत ॥३४॥ मारिली ताटका सुबाहू । तैं हा दुर्धर क्षोभ नव्हता बहू । विराध सीताग्रहणराहू । क्रोधोद्भवु तैं नव्हता ॥३५॥ हिरोनि राज्यवस्त्राभरणा । पायीं कैकेयीनें धाडिलें वना । तैं हा क्षोम नव्हता जाणा । श्रीरघुनंदनालागोनी ॥३६॥ एक रामें आपण । वधिले त्रिशिरा खर दूषण । तैं ऐसा क्रोध दारुण । नाहीं आपण देखिला ॥३७॥ सीतेचिये शुद्धींसाठीं । श्रीराम क्षोभला प्रबल सृष्टीं । स्वर्गीं देवां हडबड मोठी । धाके पोटीं कळिकाळ ॥३८॥ दानव मानव ऋषीश्वरा । धाकें चळकांप थरथरां । क्षोभला देखोनि श्रीरामचंद्रा । वसुंधरा चळीं कांपे ॥३९॥ श्रीराम क्षोभला निर्वाण । देखोनि सौमित्र आपण । धांवोनि धरिले दोन्ही चरण । क्षमा संपूर्ण करीं रामा ॥१४०॥ सावध ऐकें कृपामूर्ती । भूतां कृपाळु तूं रघुपती । तुवां निर्मिली भूतसृष्टीची स्थिती । ते वेदोक्ती अवधारी ॥४१॥ प्राण राखोनियां भूतीं । तुझेनि वायूची गती । चंद्रीं तुझेनि श्रीरघुपती । शोभा शोभती सर्वदा ॥४२॥ तुझियेनि निजतेजस्थितीं । सूर्यासी तेज अति दीप्तीं । तुझिया क्षमेनें क्षिती[7]। ते भूतें वाहिती सर्वदा ॥४३॥ समुद्र वेळा राखे सर्वदा । काळ तुज अधीन सदा । अकाळ प्रळयो न करी कदा । निजमर्यादा हे तुझी ॥४४॥ तो तूं आजि स्थिति काळासी । अकाळप्रळयो करूं पाहसी । विचारूनि निजमानसीं । क्षमा क्षोभासी करीं रामा ॥४५॥ तूं सृष्टीचा आदिकर्ता । तुझेनि बाळक विधाता[8]।

---

शब्दार्थ - १. मारून, २. मानगोटी, मान, ३. मोडीन, ४. आज्ञेत वागविणारा, ५. भीतीने, ६. सुगावा लागवा म्हणून, ७. पृथ्वी, ८. ब्रह्मदेव.

आपली परिपूर्ण पूर्णता । श्रीरघूनाथा आठवीं ॥४६॥ ऐसें ऐकोनि सौमित्रवचन । निजक्षोभातें स्वयें प्राशून । संतोषोनि श्रीरघुनंदन । दिधलें आलिंगन सौमित्रा ॥४७॥ ऐकोनि बंधूची विनंती । संतोषला श्रीरघुपती । प्राशूनियां क्रोधवृत्ती । सुखशांतीं तुष्टला ॥४८॥ संतोषोनि श्रीरघुपती । दोघे बैसले सुखस्थिती । जाली पूर्णिमा पूर्णराती । उदयप्राप्ती चंद्राची ॥४९॥ एकाजनार्दना शरण । आठविता पूर्णपण । श्रीराम सुखें सुखावोन । केलें शयन तृणशय्ये ॥१५०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां श्रीरामसीताशोकविलापनं नाम एकोनविंशतितमोऽध्यायः ॥१९॥ ओव्या ॥१५०॥ श्लोक ॥२७॥ ॥ एवं ॥ ॥१७७॥

## अध्याय विसावा

### उमा व श्रीराम यांचा संवाद

**पौर्णिमेच्या रात्री गवताच्या अंथरुणावर पहुडले असता श्रीरामांचा झालेला मनःक्षोभ :** श्रीरामचंद्राय नमः ॥ पूर्णिमेची रात्रीं शोभयमान । तृणशेजे[१] रघुनंदन । करिता जाला सुखें शयन । करीं पादसंवाहन[२] सौमित्र ॥१॥ चंद्रादय मनोहर । चंद्रकिरण अति सुकुमार । अंगीं लागतां श्रीरामचंद्र । उठी सत्वर गजबजोनी ॥२॥

सौमित्रे ननु सेव्यतां तरुतलं चंडांशुरुज्जंभते । चंडांशोर्निशि का कथा रघुपते चंद्रोयऽमुन्मीलति ।
वत्सैतद्भवता कथं नु विदितं धत्ते कुरंगं यतः । क्वासि प्रेयसि हा कुरंगनयने चंद्रानने जानकि ॥१॥

श्रीराम म्हणे लक्ष्मण । खडतर सूर्याचे किरण । मज बाधिती दारुण । बैसूं दोघे जण तरुतळीं ॥३॥ तंव सौमित्र म्हणे श्रीरघुनाथा । रात्रीं कायसी सूर्याची कथा । हा अमृतांशु[३] चंद्र तत्वतां । निववी समस्तां निजकिरणीं ॥४॥ जरी हे चंद्रबिंब सांगसी पूर्ण । सौमित्रा तुज हें कैसें ज्ञान । बिंबीं देखोनियां मृगचिन्ह । चंद्रलक्षण मी जाणें ॥५॥ जरी हें चंद्रबिंब निजचिन्हीं । एकत्र देखतसों नयनीं । तरी मृगनयना चंद्रवदनेसी । जनकनंदिनी ते कोठें ॥६॥ जरी मृगचिन्ह चंद्र देखसी । तरी मृगनयना चंद्रवदनेंसीं । सीता दाखवीं मजपासीं । म्हणोनि उसकाबुकसीं स्फुंदत ॥७॥ हा हा सीता प्रियकांता । सुखरूपा जनकदुहिता । लक्ष्मणा कोठे आहे सीता । दुःखावस्था अनुवादे ॥८॥ पाठींसी उभी माझी सीता । पुढें पळे जनकदुहिता लक्ष्मणा धांव धांव तत्वतां । रुसली कांता बुझावीं[४] ॥९॥ सर्वेचि बोले आन आन । चंद्रे द्वंद्व मांडिलें जाण । खडतर तावितात[५] किरण । तापलों पूर्ण सौमित्रा ॥१०॥

चंद्रश्चंडकरायते मृदुगतिर्वातोऽपि वज्रायते । माल्यं सूचिकुलायते मलयजो लेपः स्फुलिंगायते ।
रात्रिः कल्पशतायते विधिवशात्प्राणोऽपि भारायते हात हंत प्रमदावियोगसमयः संहारकालायते ॥२॥

**कामज्वराची पीडा व श्रीरामाची मनःस्थिती :** लक्ष्मणा सावध ऐकें तू आतां । चंद्रमा दवडीं गां परता । न चवे तरी करीन घाता । संतापता मज तावी ॥११॥ लक्ष्मण घाली शीतल वारा । म्हणे तूं द्वंद्वा पेटलासी सौमित्रा । मज हाणिसी वज्रधारा । दशशिरा मिनलासी[६] ॥१२॥ येथोनि ठऊठ जाय परता । करूं आलासी माझे घाता । ऐसा विरहज्वर श्रीरघुनाथा । संतापता अति तावी ॥१३॥ शीतोत्पली[७]सुमनशेजार । तेथें निजविला श्रीरामचंद्र । तंव सुयांनीं खिळिलें सर्व शरीर । आप्त सौमित्र मज द्वंद्वी ॥१४॥ जो तूं होतासी सुमित्र । तो तूं जालासी कुमित्र ।

---

शब्दार्थ - १. गवताच्या अंथरुणावर, २. पाय दाबणे-चेपणे, ३. ज्यांचे किरण अमृतरूपी आहेत असा चंद्र, ४. मजबूत कर, ५. तापवितात, ६. मिळालास, ७. थंड, कमलांची, ८. शत्रू.

सुयांनी खिळिलें सर्व गात्र[१] । वृथा वैर कां करिसी ।।१५।। सवेग निघावया धगी । बावन्न चंदन लाविले अंगीं । क्रोधें श्रीराम बोले वेगीं । आगी सर्वांगीं लाविली ।।१६।। सीताविरहें अति विव्हळ । त्यावरी लाविलें त्वां विंगळ[२] । न भेटतां जनकबाळ । प्रळयकाळ मज आला ।।१८।। सीतेचे वियोगविरहें । सूर्य निमाला रे नेणों काये । रात्रि जाली कल्पप्राये । करूं मी काय सौमित्रा ।।१८।। मजसीं वैर चालवी चंद्र । वैरा पेटला सौमित्र । वायु चालवी वैराकार[३] । वज्रधार मज लागे ।।१९।। सीतावियोगविरहें जाण । माझा निघों पाहे प्राण । सौमित्रा वेगीं रचीं सरण[४] । अलोट मरण मज आलें ।।२०।। ऐसें बोलत बोलतां । सर्वेचि धांवे म्हणे सीता । वृक्षांसि म्हणे माझी कांता । गुल्मलता आलिंगी ।।२१।। सीता म्हणोनियां जाण । श्रीराम चुंबी पाषाण । धांवोनि हृदयीं धरी तृण । सीता संपूर्ण हे माझी ।।२२।। लक्ष्मणासी म्हणे तूं सीता । तूंचि माझी निजकांता । ऐसी सीतेची अवस्था । श्रीरघुनाथा अति भ्रांती ।।२३।। मी येथें सौमित्रा सांग कोण । तूं श्रेष्ठ सखा स्वामी संपूर्ण । स्वामित्व मज कैंचें जाण । अयोध्यापति संपूर्ण श्रीराम ।।२४।। तूं मजपासीं कैंचा कोण । हर हर मी काय सांगूं आपण । नित्यानुवर्ती[५] लक्ष्मण । मज सेवक संपूर्ण आज्ञाधारी ।।२५।। तरी वनीं कां हिंडसी एकाकी । प्रियप्राप्तीच्या अनुलक्षीं । प्रिया कोण कैंची कीं । तुझी भार्या जानकी जनकात्मजा ।।२६।। ऐसी आठवण देतां । जानकी आठवली चित्ता । हा हा केउती गेली सीता । भेटवीं आतां सौमित्रा ।।२७।।

**श्रीरामांची ही अवस्था पाहून पार्वतीने श्रीशंकरांना केलेला प्रश्न :** ऐसें देखोनि श्रीरामासी । उमा विनवी महेशासी । कांहींएक पुसेन तुम्हांसी । तें निश्चयेंसीं मज सांगा ।।२८।। तुम्हींच सांगितलें आपण । श्रीराम परब्रह्म पूर्ण । त्यांचे स्वरूप तें कोण । कृपा करून मज सांगा ।।२९।। म्हणोनि घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले दोनी चरण । मग तीस उठवोनि जाण । शिव आपण स्वयें सांगे ।।३०।। वनामाजि जो विचरत । सीतेलागीं आर्तभूत । पूर्णब्रह्म श्रीरघुनाथ । जाण निश्चित पार्वतिये ।।३१।। पार्वती म्हणे विषयासक्त । स्त्रीकामार्थी अति लोलुप्त । शिव म्हणे तेंचि सदोदित । ब्रह्म रघुनाथ पार्वतिये ।।३२।।

**शिवाचे उत्तराने उमेचे उपहासगर्भ हास्य :** उमा म्हणे रडत पडत । अहर्निशीं तडफडत । सीतेलागीं चरफडत । तरी ब्रह्म रघुनाथ शिव म्हणे ।।३३।। तुम्हांसी काय हेंचि ध्यान । तुम्हांसी काय हेंचि चिंतन । शिव म्हणे ज्ञानविज्ञान । आम्हां ब्रह्म पूर्ण श्रीराम ।।३४।। विषयकामी कामासक्त । धन्य धन्य हे दोघे देवभक्त । ऐसी उमा उपहासें हांसत । ब्रह्म रघुनाथ शिव म्हणे ।।३५।। रडत पडत तरफडत । विषयकामी कामासक्त । तरी परब्रह्म श्रीरघुनाथ । जाण निश्चित पार्वतिये ।।३६।।

**शिवाच्या अनुज्ञेने रामांची कसोटी पाहण्यासाठी निघते :** उमा म्हणे महेशासी । जरी म्यां ठकविलें श्रीरामासी । तरी शिव म्हणे पार्वतीसी । ब्रह्मत्व त्यासी पैं नाहीं ।।३७।। तुमचें जालिया आज्ञापन । क्षणार्धें छळीन रघुनंदन । शिव म्हणे तो सावधान । सुखें छळण तूं करी त्यासी ।।३८।। ऐसें शिवासीं बोलतां । उमा स्वयें जाली सीता । मग छळावया श्रीरघुनाथा । अतिलाघवता[६] छळणार्थी ।।३९।।

**सीतेचे रूप घेऊन उमा रामांकडे जाते :** हा हा सीता स्वयें म्हणत । वनीं विचरे[७] श्रीरघुनाथ । तंव त्यासन्मुख येवोनि ओ म्हणत । उमा वनांत पैं आली ।।४०।। ओ म्हणोनि रामापुढें । राम सीता म्हणे आणखीकडे । ते तंव येओ तिकडे । तंव श्रीराम म्हणे आणखीकडे सीता ।।४१।।

---

शब्दार्थ - १. शरीर, २. निखारे, ३. द्वेष, ४. चिता. ५. रोज सह फिरणारा. ६. मोठ्या चातर्याने. ७. फिरे.

जंव जंव ते ये रामासन्मुख । तंव तंव श्रीराम होय तिसीं विमुख । हा हा सीते फोडोनि हाक । अधोमुख विलपत ॥४२॥ तंव लक्ष्मण विचारी निजचित्ता । वृक्षपाषाणां म्हणे सीता । ते जानकी सन्मुख असतां । दुःखावस्था कां श्रीरामा ॥४३॥

त्या उमारूपी सीतेची उपेक्षा केलेली पाहून लक्ष्मणाला आश्चर्य : तंव लक्ष्मण म्हणे श्रीरघुनाथा । दुःख कां करितां भेटली सीता । तंव त्यासी हाणूं धांवे लाता । बोल बोलतां मारूं पाहे ॥४४॥ मग सौमित्र म्हणे कोपसी वृथा । पैल सन्मुख उभी सीता । ऐसें बोलणें ऐकतां । शस्त्रें घाता करूं धांवे ॥४५॥ सौमित्र आम्ही तुम्ही सहोदर[१] । तो तूं मजसीं करिसी वैर । येथें कैंची सीता सुंदर । दुःख दुर्धर मज आलें ॥४६॥ अति भ्रांति श्रीरघुनाथा । मारूं धांवे सीता सांगतां । लक्ष्मण म्हणे न बोलें आतां । बोलों जातां मारील ॥४७॥ सन्मुख भेटलीसे सीता । तेचि प्रबोधील[२] श्रीरघुनाथा । आतां मी न बोले सर्वथा । म्हणोनि मौनावस्था लक्ष्मणीं ॥४८॥

तसेच स्वर्गस्थ देवांनाही गूढविस्मय : तंव स्वर्गीं सुरवरां समस्तां । ओढवली परमावस्था । बंदीं[३] सुटोनि लंकानाथा । वना सीता केंवी आली ॥४९॥ विस्मय करिती ऋषीश्वर ( विस्मय करिती सुरवर । जे ठकवूनियां दशशिर । सीता सुंदर वना आली ॥५०॥ ऐसें ब्रह्मा मानी अपूर्वता । भस्म करोनि लंकानाथा । वना आली सती सीता । तेणें विधाता विस्मित ॥५१॥ पार्वती स्वयें जाली सीता । हें न कळे ब्रह्मादिकां समस्तां । तें कळलें श्रीरघुनाथा । सर्वांगें ज्ञाता श्रीराम ॥५२॥ श्रीराम अलिप्त ज्ञानें ज्ञाता । त्यासी मानिती अति भ्रांतता । पुढें काय वर्तली कथा । सावधानता अवधारा ॥५३॥

नंतर ती सीतास्वरूपी उमा श्रीरामांना प्रश्न करिते : लक्ष्मण राहिला धरोनि मौन । मग सीता सीता जल्पे रघुनंदन । तंव कृत्रिम सीता धरी धांवोन । सावधान व्हावें तुम्हीं ॥५४॥ मी जवळीच उभी असतां । व्यर्थ कां धांवा म्हणां सीता । स्त्रीविरहें रडतां पडतां । लाज सर्वथा न ये तुम्हां ॥५५॥ पूर्वी बोलोनि निजमहिमान । मी श्रीराम नित्य सावधान । तें स्त्रीविरहें बुडालें ज्ञान । अति अज्ञान जालेती ॥५६॥ अज्ञानाची अगाध मात[४] । बुडविला प्रपंच आणि स्वार्थ । सखा बंधु भक्त विनवित । त्याचाच घात करूं धांवा ॥५७॥ सखा बंधु आणि भक्त अनन्य । त्याचें करूं धांवा हनन । बुडालें प्रवृत्तीचें[५] ज्ञान । ब्रह्मज्ञान तुम्हां मग कैंचें ॥५८॥ मज क्षण एक न भेटतां । जड मूढ जालेती भ्रांत अवस्था । प्रवृत्तिज्ञान नाठवे चित्ता । मग परमार्थता तेथें कैंची ॥५९॥ वनीं मी राहोनि अति गुप्त । तुमचें पाहिलें आचरित । तंव तुम्ही जालेती अति भ्रांत । मग धांवत मी आलें ॥६०॥

स पण्डितो नरश्रेष्ठ प्राज्ञः कर्मविदां वरः । अप्राज्ञ इव किं राम भायहितोर्विमुह्यसे ॥३॥

पूर्वी मी म्हणसी आत्मा तत्वतां । परी स्त्रीविरहें तोचि आतां । कर्म करोनि अकर्तात्मता[६]। जडमूढता अति भ्रांत ॥६१॥ जरी वियोगें भ्रांति मोठी । तरी तुम्हां आम्हां जाली भेटी । आंता भ्रांति सांडोनियां पोटीं । पंचवटीं जाऊं दोघें ।६२॥ मर्यादा वर्षे चतुर्दश । आम्हीं करावा वनवास । आतां उरले असती षण्मास । अयोध्येस मग जाऊं ॥६३॥

श्रीराम तिचे सत्य स्वरूप ओळखून तिला तुकाई जगदंबा अशी हाक मारतात : श्रीराम म्हणे तू काई । तेंचि नाम लोकांच्या ठायीं । अद्यापि राहिलेंसे पाहीं । म्हणती तुकाई जगदंबा ॥६४॥ तुकाई नामें नामाभिधान । तें जगदंबेचें निजस्थान । अद्यापि पूजिती जन । अति पावन दंडकारण्यीं ॥६५॥ श्रीरामवरदायिनी माता । तुकाई म्हणती रामबाक्यार्था । पुढे काय वर्तली कथा । सावधान श्रोतां परिसावी ॥६६॥ हांसोनि बोले श्रीरघुनंदन । माते तुज आलों लोटांगण ।

शब्दार्थ - १. सख्खे बंधू, २. समजावील, ३. बंधनातून, ४. गोष्ट, ५. प्रपंचाचे, ६. अकर्तृत्व.

तुवां माझें न करावें छळण । मी अनन्य दीन शिवाचें ।।६७।। श्रीराम म्हणे सीतेसी माता । तो विस्मय लक्ष्मणाच्या चित्ता । आश्चर्य सुरवरां समस्तां । नोळखे कांता ऋषी म्हणती ।।६८।।

**श्रीरामांच्या प्रश्नाने उमा उद्विग्न व तिची शरणागती :** श्रीराम म्हणे पुढती तिसी । एकलें सांडोनि शिवासी । सीतारूपें छळवयासी । तूं को आलीस जननीये ।।६९।। ऐकोनि श्रीरामाचें वचन । सीतेची स्वरूपता सांडोन । उमा घाली लोटांगण । श्रीराम सर्वज्ञ छळवेना ।।७०।। शिव बोलिला सत्यवचन । श्रीराम नित्य सावधान । त्यासीं तुझे न चले छळण । तें प्रमाण मज आलें ।।७१।। मी शिवाची शिवशक्ती । सीता जालें अतर्क्ययुक्ती । ब्रह्मादि देव मज नेणती । तुवां श्रीरघुपती ओळखिलें ।।७२।। श्रीरामाचें अगाध ज्ञान । न चले छळण छद्म-कामन । ऐसी बाणली उमेसी निजखूण । मग धरोनि चरण पुसतसे ।।७३।।

**खऱ्या स्वरूपाचे ज्ञान सांगण्याविषयींच्या उमेच्या विनंतीवरून, ते ज्ञान शिवापासूनच प्राप्त करण्याचा श्रीरामांचा तिला आदेश :** तूं सर्वार्थसर्वज्ञ संपूर्ण । अवलंबोनियां[1] संभ्रांतपण । आलिंगावया तृण पाषाण। हें काय कारण मज सांगें ।।७४।। सीताविरहें कामकामन[2] । तुज नाहीं अणुप्रमाण। ते बाणली खूण संपूर्ण । जे ब्रह्म परिपूर्ण श्रीराम ।।७५।। दुर्धर धरोनि पिशाचता। विरहेंवीण सीता सीता । म्हणोनि वनोवनीं धांवता । रडता पडता कां होसी ।।७६।। ऐसें बोलोनि आपण । मग उमा धरी श्रीरामचरण । तुझी स्थिति हे संपूर्ण । कृपा करोन मज सांगें ।।७७।। तंव श्रीराम म्हणे माझी स्थिति गती । सदाशिव जाणे निश्चितीं । तो सांगेल तुजप्रती । स्वमुखें कीर्ति नये सांगूं ।।७८।।

**ज्ञानप्राप्ती करून घेणाऱ्या शिष्याची चित्तशुद्धी असणे आवश्यक :** जरी सांगावें कृपाविधी । तरी पाहावी पात्रशुद्धीं । न व्हावा छळवादी । वादी विवादी नसावा ।।७९।। न व्हावा धूर्त[3] ज्ञानवंचक । नास्तिक दुजा शब्दवंचक । नीतिशास्त्रीं करी कुतर्क । आळसी वंचक न व्हावा ।।८०।। द्रव्यदारत्यागोन्मुख[4] । शोधित सत्वाचा सात्विक । पूर्ण परार्थी सविवेक । त्यासी परिपाक[5] सांगावा ।।८१।। तुझे अंगीं ज्ञानाभिमान । न मानोनि शिवाचें वचन । माझें करूं आलीस छळण । तुज आपण केंवी सांगों ।।८२।। नाहीं पतिवचनीं कर्तव्यार्थ । नाहीं गुरुवचनीं भावार्थ । तु सांगों नये गुह्यार्थ । ऐसे श्रीरघुनाथ बोलिला ।।८३।।

**पश्चात्तापदग्ध उमेची श्रीरामांची प्रार्थना :** ऐसें ऐकोनि श्रीरामवचन । उमा खोंचली मनीं संपूर्ण । पतिवचन गुरुवचन । उल्लंघन म्यां केलें ।।८४।। न मानोनि शिवाचें वचन । छळूं आले रघुनंदन । जळो मांझा ज्ञानाभिमान । करी रुदन अनुतापें ।।८५।। ज्ञानाभिमानाचें लक्षण । भेटल्या साधु सज्जन । जो शोधून पाहे दोषगुण । त्याचें छळण करावया ।।८६।। छळणें छळवेना श्रीरघुनाथा । शेखीं मज कोपसी ना सर्वथा । तेणें मज पालट जाला चित्ता । ऐक आतां सांगेन ।।८७।।

**त्यामुळे रामांचे समाधान व रहस्य स्पष्टीकरण :** तुझें होतांचि दर्शन । ज्ञानाभिमाना जालें दहन । छळच्छद्म[6] गेलें जळोन । तुझी आण श्रीरामा ।।८८।। ऐकोन तिचें सत्य वचन । कृपें द्रवला श्रीरघुनंदन । आपुलें अतर्क्य गुह्य ज्ञान । सांगे आपण सद्भावें ।।८९।। उमे ऐकें सावधान । पूर्वी हे वो ऋषिजन । माझे प्राप्तीलागोन जाण । केलें अनुष्ठान निष्कामें ।।९०।। माझे पावावया चरण । त्यांचा सद्भाव संपूर्ण । सांडोनि सर्वही अभिमान । तृण पाषाण होवोनि ठेले ।।९१।। एक ते वृक्ष होवोनी तिष्ठत । एक ते झाले पर्वत । एक ते तृणपाषाण होत । मी तेथें

---

शब्दार्थ – १. घेऊन, २. कामवासना, ३. कपटी, ४. धन, स्त्री, इत्यादिकांचा त्याग करण्याविषयी अत्यंत उत्सुक, ५. तत्व, सार, ६. छळ करण्याचे कपट

तेथें स्वयें धांवें ॥९२॥ त्यांचा भावार्थ देखोन । परम प्रीतीनें दें आलिंगन । त्यांसी तूं म्हणसी तृणपाषाण । पिसें पूर्ण मज म्हणसी ॥९३॥ तें तंव निरभिमानी भक्त । भक्तभावार्थी मी रघुनाथ । प्रीतीनें भक्त गिंवसित[1] । स्वयें धांवत वनोवन ॥९४॥ भक्त उद्धरावयाकारणें । रडणें, पडणें अडखळणें । पर्वतोपर्वतीं धांवणें । आणि आलिंगनें वृक्षांसी ॥९५॥ उमे जाण तूं निश्चित । माझें पाऊल न पडे व्यर्थ । जाणे सदाशिव समर्थ । तुझा भावार्थ तो नाहीं ॥९६॥ गाळींव भावाचा भावार्थ । सर्व भूतीं श्रीभगवंत । हाचि मुख्यत्वें परमार्थ । निजस्वार्थ परमार्थ ॥९७॥ गुळाचें कारले केलें । तें सकंटक कडू नाहीं जालें । तेंवी ब्रह्मवृत्तीं[2] कर्म केलें । ते मुकले बंधुत्वा ॥९८॥ साकरेचें वृंदावन[3] फळ केलें । कडू म्हणतां ते स्वयें ठकले । तेंवी साधूचें कर्म निंदोनि बोले । ते ते गेले अधःपाता ॥९९॥ साधूंची सच्चिद्[4] गरिमा । अतर्क्य त्याचें कर्म प्रेमा । ते नाकळिती मोहभ्रमा। अगाध महिमा साधूंचा ॥१००॥ ते तूं म्हणसी तृणपाषाण । तरी त्या साधूंसी ब्रह्म पूर्ण । ऐसें ऐकोनि श्रीरामवचन । मूर्च्छापन्न पार्वती ॥१॥ मी एक शक्ती तो शिव । हें नाठवे पूर्वापूर्व । श्रीरामासी रूप ना नांव । भावाभाव[5] विसरलें ॥२॥ अहं कोहं सोहंपण । येणें नासिलें मीतूंपण । कोंदाटले ब्रह्म परिपूर्ण । समाधान शिवप्रियें ॥३॥ करितां श्रीरामच्छळणोक्ती । समाधि पावली पार्वती । ऐसी संतांची संगती । उपकारार्थ अपकारियां ॥४॥ पावोनि पूर्ण समाधान । उमा जाली सावधान । त्रैलोक्य देखे चैतन्यघन श्रीराम पूर्ण तुष्टला ॥५॥

श्रीरामांचा उपदेश : श्रीराम म्हणे अहो माते । कांहींएक सांगेन तूंतें । तंव उमा म्हणे सर्वस्वार्थे । तुझे आज्ञेतें नुल्लंघीं ॥६॥ उमा धांवोनि उल्लासतां । श्रीरामचरणीं ठेविला माथा । तुझेनि जालें सुखरूपता । काय मी आतां अनुवादूं[6] ॥७॥ मिथ्या व म्हणावें शिववचन कोणाचें न करावें दळण । हेंचि मागतों मी आपण । कृपा पूर्ण करीं माते ॥८॥ श्रीरामा तुझे देखतां चरण । छळणादि वृत्तींसी जालें दहन । न करीं शिवाज्ञाहेळण । ब्रह्मपरिपूर्ण परिपाक ॥९॥

उमेचे आश्वासन : तुझें ऐकतांचि वचन । जालें अविद्येचें दहन । निमाले दळण आणि हेळण । तुझी आण श्रीरामा ॥११०॥ तुझेनि वचनें श्रीरघुनाथा । पावलें सुखसायुज्यता । मग चरणीं ठेवोनि माझे । गेली उल्लासता कैलासा ॥११॥

लक्ष्मणावर व इतरांवरही या अद्‌भुत घटनेमुळे परिणाम : उमेनें केलिया नमन । सौमित्रें स्वयें धांवोन । मस्तकीं धरिले श्रीरामचरण । काय आपण बोलत ॥१२॥ मी म्हणें हेचि आमची सीता । तंव ते शिवाची शिवकांता । भली ओळखिली श्री रघुनाथा । सर्वज्ञ सत्य तूं श्रीरामा ॥१३॥ देखोनि उमेची स्थिति गती । ब्रह्मादिक विस्मित चित्तीं । आम्ही म्हणों हे सीता सती । श्रीरामें पार्वती ओळखिली ॥१४॥ आम्ही म्हणों सीताविरहें भ्रांत । परी अचुक ज्ञाता भ्रमांत । याचा न कळे निजवृत्तांत । ब्रह्म सदोदित श्रीराम ॥१५॥ रडणें पडणें स्वैर धांवणें । देखोनि जग पिसें म्हणे । श्रीराम विचरे ब्रह्मपणें । जग उद्धरणे श्रीरामा ॥१६॥ देखोनि श्रीरामाची स्थिती । ब्रह्मादि देव विस्मित चित्तीं । मग तिहीं वंदोनि श्रीराममूर्ती । गेले निश्चितीं निजधामा ॥१७॥ फिटली देवांची निजभ्रांती । आणि लक्ष्मण पावला विश्रांती । अगाध श्रीरामाची स्थिती । नामें उद्धरती जडजीव ॥१८॥ एकाजनार्दना शरण । पुढें सीतागवेषण[7] । करूं निघाले श्रीराम लक्ष्मण । हेंही निरूपण अवधारा ॥१९॥

---

शब्दार्थ - १. शोधित, २. दृश्यमात्र सर्वच ब्रह्म अशी वृत्ती ठेवून. ३. कवंडळ, ४. सापडत नाहीत, ५. असणे व नसणे, ६. बोलू, ७. सीताशुद्धी.

**उमा-शिव संवादाचा मूळ आधार शिवरामायण :** श्रीरामउमासंभाषण । यासी मूळ शिवरामायण । ते ग्रंथींचें निरूपण । श्रोते सज्ञान जाणती ॥२०॥

**मूळ रामायण शतकोटी श्लोकसंख्येचे होते :** संख्या शतकोटी समस्त । श्रीरामायण मूळ ग्रंथ । सुर नर पन्नग यथार्थ । कलह करीत पैं आले ॥२१॥

**त्याची विभागणी करण्याच्या बाबतीत स्पर्धा :** श्रीराम राजा सुरवरांचा । त्याची कथा वांटा देवांचा । पन्नग[१] म्हणती शेषशयनींचा । राम आमचा तुम्ही कैंचे ॥२२॥ मनुष्ये म्हणती मनुष्यकृतीं । रामें केली अगाध ख्याती । आमचा वांटा श्रीरामकीर्ती । तुम्ही तदर्थीं[२] कां भांडा ॥२३॥ श्रीराम तुमचा वैकुंठपती । तरी वैकुंठीं नाहीं केली ख्याती । श्रीराम शेषशयनी जरी निश्चितीं । तरी निजेल्या कीर्ति नाहीं केली ॥२४॥ येवोनि मनुष्यलोकाप्रती । रामें केली विचित्र ख्याती । मृत्युलोकींची हे कीर्ती । तुम्ही तदर्थी कां भांडा ॥२५॥ एक खालते एक वरते । वांटा मागूं आलेती येथें । निर्लज्ज लाजाना पै चित्ते । संबंध तुम्हातें असेचिना ॥२६॥ दोघे केले निरुत्तर । तरी कथेची आवडी फार । न सोडिती येरयेर । कथामृतसार सेवावया ॥२७॥

**विभाजनाचे काम ब्रह्मदेवाने श्रीशिवाकडे सुपूर्त केले :** तंव ब्रह्मयानें बुद्धि केली जाण । वांटेकरी तिघे जण । त्यांची करावया बुझावण[३] । धाडी आपण शिवापासीं ॥२८॥ मग शिवें बुद्धि केली कैसी । तिघे येतां आपणापासीं । स्वयें राखोनि निजसारासी । विभागेंसीं बुझावी ॥२९॥ शिव म्हणे तया तिघांसी । विमुख[४] मी न धाडीं कोणांसी । वांटा देईन सम भागेंसी । वचन तिघांसी मानलें ॥१३०॥

**श्रीशिवाकडून विभागणी :** शतकोटी संख्या येथ । रामायण मूळग्रंथ । शिव वांटी त्रैलोक्यांत । विभागार्थ तो ऐका ॥३१॥ तेहतीस कोटी प्रथमांक । तेहतीस लक्ष आणिक । तेहतीस सहस्र तीनशें श्लोक । तेहतीस आणिक एक उरला ॥३२॥ श्लोक एक उरला निर्धारें । त्याचीं बत्तीस अक्षरें । तीहीं वांटिली शंकरें । परिसा आदरें वांटणी ॥३३॥

**शेवटी उरलेली 'राम' ही दोन अक्षरे विभागणे अशक्य असल्याने श्रीशिवाने ती स्वत: घेतली :** दहा दहा अक्षरें वांट्या आलीं । दोन अक्षरें तेथे उरलीं । तदर्थी शिवें बुद्धि केली । युक्त बोली बोलून ॥३४॥ अक्षरें दोन लोक तिन्ही । वांटा करितां न ये वांटणी । तरी हीं द्यावीं मज मापाऱ्यालागोनी । खळें दानीं दानार्थ ॥३५॥ मग तिघे जणीं अति उल्लासीं । दोनीं अक्षरें दिधली शिवासी । तेणें धरिलीं हृदयेसीं । अहर्निशीं श्रीराम ॥३६॥ रामायणींचे सार पूर्ण । शिवाचें वसवी हृदयभुवन । श्रीराम हीं अक्षरें जाण । ब्रह्मपूर्ण परियेसा ॥३७॥

**लोकविभाग व पोटविभाग :** लोकविभाग मुख्य एक । तेहतीस कोटी तेहतीस लक्ष । तेहतीस सहस्र तीनशें श्लोक । दहा अक्षरें अधिक मृत्युलोकीं ॥३८॥ याही भागाचें विवरण । बहुविध कवित्व रामायण । तेहीं अर्थींचें निरूपण । सावधान अवधारा ॥३९॥

**बहुत प्रकारची रामायणे :** शिवरामायण शैवरामायण । आगम पंचरात्र रामायण । गुहा गुह्यक रामायण । हनुमंत रामायण नाटक ॥१४०॥ मत्स्य कूर्म वराह रामायण । कालिकाखंडींचें निरूपण । महाकालीरामायण । स्कंदरामायण प्रसिद्ध ॥४१॥ अगस्ति पौलस्ति रामायण । पद्मपुराणींचें रामायण । रवि अग्नि वरुण रामायण । ऐकोनि आपण जटायु वक्ता ॥४२॥ नंदिग्रामीं भरत आपण । वदे तें भरतरामायण । महाभारतीचें रामायण । वक्ता आपण श्रीव्यास ॥४३॥ क्रौंचद्वीपीं अद्यापि जाण । कौचऋषि सांगे पुराण । कथा पवित्र रामायण । अति

---

शब्दार्थ - १. सर्प, २. त्यासाठी त्याकरिता, ३. समजूत, ४. दुर्मुखलेला..

पावन अनुपम्य ॥४४॥ विभीषणापासीं जाण । नित्य कथानिरूपण । धर्मऋषि सांगे आपण । धर्मरामायण धार्मिक ॥४५॥ श्वेतद्वीपींचे निरूपण । श्वेतकेतुरामायण । कथाविचित्रविंदान[1] । अति पावन तिहीं लोकीं ॥४६॥ शंकर वक्ता स्वयें आपण । श्रोती भवानी[2] सावधान । तें शिवभवानीरामायण । कथाविंदान विचित्र ॥४७॥ सदाशिव स्वयें वक्ता । स्वयें श्रीराम निजश्रोता । ते शिवरामायणी कथा । श्रवणीं ऐकतां स्वानंद ॥४८॥ स्वयें श्रीराम स्वानंदें पूर्ण । आपणाप्रति वदे आपण । ते कथा आत्मरामायण । गोड निरूपण सर्वार्थी ॥४९॥ जैमिनिकृत रामायण । अपूर्व कथेचें विंदान । अलोलिक निरूपण । आश्चर्ययुक्त जाण चरित्र ॥१५०॥ जें कां अध्यात्मरामायण । रामायणींचे वेंचे काढोन । केले आध्यात्मिक[3] निरूपण । ऋषिकृत जाण तें नव्हे ॥५१॥ मृत्युलोकामाजी भाविकीं । रामायणें असंख्यात कीं । कैसेनि आकळती तितुकीं । अल्पमात्र बोलिलों ॥५२॥ उमाश्रीरामदर्शन । समूळ मुळींचें निरूपण । एकाजनार्दना शरण । श्रोती संपूर्ण क्षमा कीजे ॥५३॥ परम विश्रांति जीवशिवां । परम विश्रांति देहविदेहभावा । तो हा प्रसंग विसावा । उमाराघवां संवादा ॥५४॥ विश्रांति त्रिविधतापोद्रवा[4]। अति विश्रांति देहभावा । तो हा प्रसंग विसावा । उमा राघवां संवाद ॥५५॥ विश्रांति निवृति अहंभावा । विश्रांति निवृत्ति सोहंभावा । तो हा प्रसंग विसावा । उमाराघवां संवाद ॥५६॥ विश्रांति अहमात्मवैभवा । विश्रांति हे ब्रह्मभावा । तो हा प्रसंग विसावा । उमाराघवा संवाद ॥५७॥ भ्रमामाजी विभ्रमठेवा[5] । भ्रमें चाळवी भवभवा । तो हा प्रसंग विसावा । उमाराघवां संवाद ॥५८॥ एकाजनार्दना शरण । अगाध रामाचें रामायण । विचित्र कथानिरूपण । ग्रंथभूषण श्रीराम ॥५९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायउमाराम संवादो नाम विंशतितमोऽध्याय: ॥२०॥ ओंव्या ॥१५९॥ श्लोक ॥३॥ एवं ॥१६२॥

## अध्याय एकविसावा

### जटायूचा उद्धार

सीतेच्या शोधासाठी मार्गक्रमण चालू असता अद्भुत राक्षसाचा पाय आढळतो : श्रीरामचंद्राय नम: ॥ उमा गेली महेशापाशीं । श्रीराम लक्ष्मण वनवासी । निघाले सीतागवेषणासी । मार्गचिन्हांसी पहाताचि ॥१॥

ददर्श भूमौ निष्क्रातं राक्षसस्य पदं महत् । स समीक्ष्य परिक्रान्तं सीताया राक्षसस्य च ॥१॥
संभ्रान्तहृदयो राम: शशंस भ्रातरं प्रियम् । इह लक्ष्मण पश्य त्वं राक्षसस्य महत्पदम् ॥२॥
मिथ्या मे तर्जित: शैलो न सीता गिरिगह्वरे । तदद्दष्ट्वा लक्ष्मणो भीत: पदं विकृतमद्भुतम् ॥३॥

मार्गी माग[6] पहात जात । तंव राक्षसपद अत्यद्भुत । देखिलें लांब बारा हात । चतुर्हस्त रुंदाळ ॥२॥ याचिपासीं सीतेचें पद । कुंकुमाकित पद्मबंध । देखोनि श्रीरामा आनंद । मार्गी माग शुद्ध लागला ॥३॥ लक्ष्मणा धांव धांव आतां । राक्षस घेवोनि जातो सीता । मार्ग ओळख तूं तत्वतां । झणीं[7] दुश्चित होशील ॥४॥ राक्षसपद अति विक्रांत[8] । देखोनि लक्ष्मण विस्मित । सर्वेचि जाहला भयभीत । सीता भक्ष्यार्थ न वधावी ॥५॥ मार्गी देखिला जो माग । त्याचा दोघीं धरोनियां लाग[9] । धांवणें धांवतां सवेग । जटायु भग्नांग देखिला ॥६॥

शब्दार्थ - १. कथेतील विचित्र गोष्टी, २. पार्वती, ३. काही प्रतीत या ठिकाणी 'आधुनिक' हा शब्द आढळतो. परंतु धुळ्याच्या हस्तलिखित प्रतींत मात्र 'आध्यात्मिक' असाच शब्द आहे. आम्हांलाही 'आध्यात्मिक' हाच शब्द येथे अर्थानुसंधानाच्या दृष्टीने संयुक्तिक वाटल्यामुळे आम्ही तोच ग्राह्य धरला आहे. प्रस्तावना पाहावी. - संपादक, ४. 'आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक हे तीन प्रकारचे ताप, ५. भ्रांती, ६. शोध, ७. कदाचित, ८. भयंकर, ९. ठिकाणा.

अथ पर्वतसंकाशं छिन्नपक्ष द्विजोत्तमम् । ददर्श पतितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् ॥४॥

तं दृष्टवा गिरिशृंगाभं रामो लक्ष्मणमब्रवीत् । अनेन सीता वैदेही भक्षिता नात्र संशयः ॥५॥

अधिक पुढे गेल्यावर रक्ताने माखलेला असा एक अति भव्य देह आढळला : जैसा कां महापर्वत । शेंदूरें न्हाणिला धगधगित । तैसा जटायु भासत । रक्तें आरक्त सर्वांगें ॥७॥ त्यासी देखोनि श्रीरघुनाथ । सौमित्रासी स्वयें सांगत । सीता भक्षोनि पाशिलें रक्त । दिसे आरक्त राक्षस ॥८॥ त्याचा करीन मी घात । बाण सज्जोनि रघुनाथ । कोपें चालिला कृतांत । सीतासाह्यार्थ प्रतापी ॥९॥ माझी भक्षोनियां कांता । तूं कोण रे वनीं वसता । तुझ्या मी करीन निजघाता । होय गर्जता श्रीराम ॥१०॥ ऐकोनि श्रीरामाची वाणी । जटायु घायवट[१] धरणीं । काय बोले दीनवचनीं । सावधानी अवधारा ॥११॥

स दीनो दीनया वाचा सफेनं रुधिरं वमन् । अभ्यभाषत पक्षीशो राम रामेति राघव ॥६॥

यामोषधिमिवायुष्मन्नन्वेषसि महावने । सा देवी मम च प्राणा रावणेनोभयं हृतम् ॥७॥

जटायूने स्वतःची ओळख देऊन वृत्तांत निवेदन केला : ऐकोनि श्रीरामांचे वचन । जटायु म्हणे मी धन्य धन्य । करावया माझें दीनोद्धरण । स्वयें आपण श्रीराम आला ॥१२॥ श्रीरामाचें आगमन । सीताशुद्ध्यर्थ नव्हे जाण । करावया दीनोद्धरण । वनाभिगमन[२] श्रीरामा ॥१३॥ सफेन[३] रुधिर वमून । जटायु सांडीत होता प्राण । ऐकोनियां श्रीरामवचन । जाला सावधान भावार्थे ॥१४॥ श्रीराम जय राम जयजय राम । जटायु स्मरे रामनाम । माझा छेदावया देहभ्रम । अंतीं श्रीराम पावला ॥१५॥ धन्य धन्य वृक्षवल्ली औषधी । श्रीराम विचरे ज्यांसन्निधीं । ते पावन गा त्रिशुद्धी । कृपानिधि श्रीराम ॥१६॥ ऐकें श्रीराम रघुपती । वनीं विचरसी जीचे अर्थीं । ते म्यां देखिली सीता सती । नेली निश्चतीं रावणें ॥१७॥ सीता मज पूज्य गुरुपत्नी । गुरुत्वें प्रिय प्राणांहूनी । तुम्ही आश्रमीं नव्हतां कोणी । नेली चोरोनी रावणें ॥१८॥

त्वया विरहिता देवी लक्ष्मणेन च राघव । ह्रियमाणा मया दृष्टा रावणेन बलीयसा ॥८॥

आश्रमातून रावणाने सीतेला पळविली : तुज गेलिया मृगापाठीं । लक्ष्मणें सांडिली पर्णकुटी । वेगें येवोनि रावण कपटी । सीता गोरटी नेली तेणें ॥१९॥ सीता बळें हरिली रावणें । तुमचें नव्हेचि धांवणें । आक्रंदत नेली तेणें । ते म्यां देखणे[४] देखिली ॥२०॥ ऐसें ऐकोनि श्रीरघुनाथा । मज मानिसी नपुंसकता । तरी सीतेनिमित्त लंकानाथा । केलें तें आतां ऐका स्वामी ॥२१॥

सीतामभ्यवपन्नोऽहं रावणश्च रणे प्रभो । विध्वंसितरथच्छत्रः पातितो धरणीतले ॥९॥

एतदस्य धनुर्मग्नमेते चास्य शरास्तथा । अयमस्य रणे राम भग्नः सांग्रमिको रथः ॥१०॥

अत्र युद्धं मया दत्तं रावणस्य पुनः पुनः । पक्षपातैर्नखैर्घोरैर्गात्राण्यारुह्य वैरिणः ॥११॥

तें मी प्रत्यक्ष पाहिल्याने त्याच्याशी युद्ध केले : रावणें हरितां सीतेसी । मी गेलों होतों वनक्रीडेसी । तंव सीता आक्रंदत आक्रोशीं । मी वेगेंशी पावलों ॥२२॥ घोर युद्ध केलें रणीं । पैल पाहें रक्तांकित धरणी । रावणातें म्यां जाचूनी[५] । छत्र भंगोनी पाडिलें ॥२३॥ त्याचे जे कां धनुष्यबाण । नखें म्यां केले चूर्ण । रथींचे खर पिशाचवदन । तेही सप्राण निर्दाळिले ॥२४॥ युद्ध जालें कडकडाट । ध्वज भंगिला अति उद्भट । रथ सारथि करोनि पीठ । शिरींचा मुकुट पाडिला ॥२५॥

---

शब्दार्थ – १. घायाळ, २. वनात जाणे, ३. फसासकट, ४. दृष्टीने, ५. त्रास देऊन.

**जटायूसमोर रावणाचे सामर्थ्य निष्फळ ठरते :** युद्धीं भंगिला रावण । मजसीं न चाले आंगवण । मग मज ठकवोनि जाण। सीता घेवोनि निघाला ॥२६॥ राक्षसमावा[१] गुप्तत्वेंसीं । सीता घेवोनि काखेसीं । कळों न देतां पशुपक्ष्यांसी । निघे आकाशीं अति गुप्त ॥२६॥ मजही हडबड जाली मोठी । हातींची नेली सीता गोरटी । काय श्रीरामा सांगूं गोष्टी । लाज पोटीं सलज्ज ॥२८॥ मग पाहतां खुंटल्या दृष्टी । रावणें सीता नभाचे पोटीं । देखोनि धांविनलों उठाउठीं । झडपेसाठीं[२] सांडविली ॥२९॥ वेगीं धांवोनि सत्वर । घायीं घायवट केलें शरीर । नखें विदारितां दशशिर । वाहे पूर रुधिराचा ॥३०॥

**रावणाने घाबरून सीतेला मुक्त केली :** मुखीं नखीं पाखीं झडपित । रावण केला अस्ताव्यस्त । सीता सांडोनि त्वरित । पळे लंकनाथ अति धाकें ॥३१॥ पक्षें सांडविली सीता । हे मज लाज लंकानाथा । मग युद्धा प्रवर्तला मागुता । सलज्जता अभिमानें ॥३२॥ तो मज रागें हाणी लाता । म्यां चुकविल्या तळपतां । तेणें मज हाणितां मुष्टिघाता । अति झडपितां झडपिला ॥३३॥ ऐसा पक्षवातावर्त । त्यामाजी नखमुखांचे आघात । रावणा करोनि अस्ताव्यस्त । रणीं मूर्च्छित पाडिला ॥३४॥ उभय पांखांच्या अति वाता । गगनीं उडविलें लंकानाथा । तेथोनि तळीं पडतपडतां । उडोनि मागुता झडपिला ॥३५॥ देखोनि माझी आंगवण । रावणें दांतीं धरिले तृण । येथोनि पुरे पुरे रण । दीनवदन अति दुःखी ॥३६॥

**रावणाची मानहानी, त्यामुळे युद्धासाठी त्याचे पुनरागमन :** पक्षी नावरे रणांगणीं । रावणा जाली मानहानी । मुख दाखविता लाज जनीं । आला परतोनि रणासी ॥३७॥ मज छळावया पाहीं । रावण आला लवलाहीं । दोघे झुंजूं उसण्या[३] घायीं । तें म्यां पाहीं मानिलें ॥३८॥

**रावणाचे कपटाचरण :** मज तुझी घालोनि आण । रावण पुसे माझें मरण । असत्य न वदें गेलिया प्राण । तुझी आण नुल्लंघीं ॥३९॥ रावणाचें निजमरण । म्यांही पुसिलें आपण । मिथ्यावादी पापी पूर्ण । प्रतारोन[४] बोलिला[४] ॥४०॥ तुझेनि भजनें सत्यसात्विकी । मृत्यु सांगितला दोहीं पाखीं । रावण सांगे वामांगुष्ठनखीं[५] । महापातकीं अनृतवादी[६] ॥४१॥ खग खेचर अति आवेशीं । दोघे मिनलों संग्रामासीं । लक्ष ठेवोनियां वर्मासी । युद्ध आकाशी निराधारीं ॥४२॥ पांखीं झडपोनि दशानन । वामांगुष्ठा केलें छेदन । तेणें न मरेचि रावण । कपटी पूर्ण अनृतवादी ॥४३॥ रावण बोलिला भावार्थ । ऐसा माझे मनीं मनोरथ । यालागीं करोनि पुरुषार्थ । अंगुष्ठ त्वरित छेदिला ॥४४॥ छेदितां वामांगुष्ठनख । हातातळीं आले पांख । रावणें उपडिले देख । परम दुःख मज जालें ॥४५॥

**डोळ्यांसमोर सीता पळविल्यामुळे जटायूला दुःख :** उपडिलें तेणें निजपांख । त्याचें मज नाहीं असुख[७] । सीता नेली मज प्रत्यक्ष । परम दुःख श्रीरामा ॥४६॥ ऐशी रावणा लाविली ख्याती । तूं न पावसीच रघुपती । यश न ये माझ्या हातीं । सीता सती नेली तेणें ॥४७॥ पांख छेदिल्याचें दुःख कोण । वेगीं न येसीच तूं आपण । सीता घेवोनि गेला रावण । दुःख दारुण मज जाहलें ॥४८॥ मजचि देखतदेखतां । रडत रावणें नेली सीता । थोर दुःख हें रघुनाथा । किती आतां मी सांगूं ॥४९॥

**रामस्तस्य तु विज्ञाय सीतासक्तां प्रियां कथाम् । गृधराजं परिष्वज्य रुरोद सहलक्ष्मणः ॥१२॥**

---

**शब्दार्थ -** १. राक्षसाची कपटे, २. झडपेबरोबर, ३. समोरासमोर, ४. खोटे सांगितले, ५. डाव्या पायांच्या अंगठ्यात, ६. खोटे बोलणारा, ७. दुःख, ८. माझ्या देखत.

**जटायूचे वृत्त ऐकून रामलक्ष्मणास दु:ख :** ऐसें ऐकोनि जटायुवचन । अत्यंत कृपें रघुनंदन । त्यासी देतां आलिंगन । आलें रुदन श्रीरामा ॥५०॥ सखा बंधु पुत्र आप्त। घायीं पडलिया रणांत । तैसियापरी श्रीरघुनाथ । असे स्फुंदत कृपाळु ॥५१॥ युद्धीं गांजोनि रावण । सीता सोडविली जाण । तो जटायु मारिला छळून । दु:खें लक्ष्मण विलपत ॥५२॥ जरी हा युद्धसमयीं येता । तरी कैसैनि रावण सीता नेता । माझा जटायु वांचता । अतिदु:खिता सौमित्रा ॥५३॥ कोणी न सांगेचि धडपुढें[1]। यालागीं हिंडों मागें पुढें । मार्ग लागता निवाडें । तरी कैवाडें धांवतो ॥५४॥ देखोनि जटायूच्या घाता । लक्ष्मणासी परम व्यथा । सखा निमाला सर्वथा । दु:खावस्था विलपत ॥५५॥

**जटायो यदि शक्नोषि वाक्यं व्याहरितुं पुन: । सीतामाख्याहि भद्रं ते वधमाख्याहि चात्मन: ॥१३॥**

**जटायू बेशुद्ध असल्यामुळे सीतेला कोठे नेली हे माहीत नव्हते :** श्रीराम पुसे जटायूसी । जरी शक्ति असेल बोलावयासी । तरी सीताशुद्धि ये वेळेसीं । पुसेन तैसी मज सांगें ॥५६॥ सीता हरूनी रावण । कोणे दिसे केलें गमन । कोण त्याचें स्थान भुवन । हें संपूर्ण मज सांग ॥५७॥ ऐसी श्रीराम पुसतां गोष्टी । जटायूसी आनंद पोटीं । धन्य धन्य आजी मी सृष्टीं । श्रीराम दृष्टीं देखिला ॥५८॥ रावणें नेली सीता गोरटी । हे समूळ सांगावया गोष्टी । आत्मा म्यां धरिला कंठीं । तुझे चरण दृष्टीं देखावया ॥५९॥ मी पडलों मूर्च्छापन्न । केउतें[2] रावणें केले गमन । तेणें त्याचें स्थान आणि भुवन । सांगतां नयन लाविले ॥६०॥ सत्य जाण श्रीरघुनाथा । येथोनि न बोलवे आतां । तुझे चरणीं ठेवोनि माथा । मी निजजीविता[3] त्यागितों ॥६१॥

**रामाची त्यास बरा करण्याची इच्छा व तसे आश्वासन :** सीताहरणाचें असुख[4] । तैसें मज नाहीं आत्यंतिक । जटायुमरणाचें दु:ख । परम शोक सौमित्रा ॥६२॥ मदर्थे येणें वेंचिला प्राण । याचें व्हावया उत्तीर्ण । जटायूस आश्वासून । श्रीरघुनंदन अनुवादे ॥६३॥ कृपा उपजली श्रीरघुनाथा । नाभीं म्हणोनि जाला बोलता । तुज मीं वांचवीन गा आतां । झणीं[5] जीविता सांडिसी ॥६४॥ तुझें निवारीन दु:ख । तुज मी देईन दोनी पांख । वांचवीन वर्षे असंख्य । मरणोन्मुख कां होसी ॥६५॥ आम्ही तुम्ही तिघे जण । शोधून मारूं वैरी रावण । तूं युद्धा साह्यकारी संपूर्ण । झणीं प्राण सोडिसी ॥६६॥ स्वर्गी नमुचीच्या युद्धार्था । साह्य जालासी दशरथा । तैसा साह्य होई आतां । लंकानाथा वधावया ॥६७॥

**जटायूने हास्य करून मुक्तीची इच्छा व्यक्त केली :** ऐकोनि श्रीरामाचें वचन । जटायु जाला हास्यवदन । वांचविसी हें नवल कोण । तूं स्रष्टा संपूर्ण सृष्टीचा ॥६८॥ तुझिया संकल्पसत्ते आंत । जगा उत्पत्ति स्थिति अंत । ब्रह्मा विष्णु शिव आज्ञा वंदित । ऐसा तूं समर्थ श्रीरामा ॥६९॥ तुज मारितां रावण । निमेषार्थ न लागे जाण । तेथें मशक मी साह्य कोण । विज्ञापन अवधारीं ॥७०॥ मज आयुष्य आकल्प पूर्ण । परि हेंचि नित्य चिंतन । जे ठाकोनियां श्रीरामचरण । माझें जन्ममरण छेदावें ॥७१॥ श्रीराम भेटावा अंतगतीं । योगी संन्यासी चिंतिती । तो तूं भेटलासी कृपामूर्ती । देहलोभे चित्ती मज नाहीं ॥७२॥

**असे तुझ्या सन्निध मरण येणे फार दुर्लभ :** ऐकें श्रीरामा सावधान । आतांच्या ऐसें मज मरण । पुढें सर्वथा न लाभे जाण । हेंही लक्षण अवधारीं ॥७३॥ वाचे श्रीरामनामस्मरण । दृष्टीं श्रीरामदर्शन । हृदयीं श्रीरामाचें ध्यान । ऐसें मरण मग कैंचे ॥७४॥ अंतीं तूंतें श्रीरामा स्मरतां ।

---

शब्दार्थ - १. सत्य, २. कोठे, ३. आपले प्राण, ४. दु:ख, ५. प्राण सोडू नको.

चारी मुक्ती देसी भक्तां । तें तूं पूर्ण ब्रह्म भेटलें असतां । देहलोभता मज नाहीं ॥७५॥ माझ्या पूर्व भाग्याच्या कोटी । तेणें श्रीराम परब्रह्म देखिला दृष्टीं । माझा देह लोभ निवटी[१] । कृपादृष्टीं मज पाहें ॥७६॥ रावणें केलें पक्षच्छेदन । छेदिला उभयपक्षाभिमान । तेणें तुष्टला श्रीरघुनंदन । वांचलेपण पुरे श्रीरामा ॥७७॥ माझ्या भाग्याची निजगती । श्रीराम पावला कृपामूर्ती । आतां नको देह संगती । कृपामूर्ति श्रीरामा ॥७८॥ म्हणोनि धरले दोनी चरण । माझें निवारीं जन्ममरण । ऐकोनि जटायूंचे वचन । श्रीरघुनंदन तुष्टला ॥७९॥

या च भूमिप्रदातृणामाहिताग्नेश्च या गतिः । गोहिरण्यप्रदातृणां या गतिः शरणार्थिनाम् ॥२४॥

श्रीरामांनी त्या जटायूला उत्तम गती दिली : श्रीरामकाज लक्षून । सीतार्थीं[२] वेंचिला प्राण । त्यासीं श्रीराम संतोषोन । गति संपूर्ण स्वयें देत ॥८०॥ सोमयाग श्येनयाग । अश्वमेधादि नाना याग । अग्निहोत्राची गति सांग । जटायूस योग्य न मानीच राम ॥८१॥ गोदान भूमिदान तिळदान । हिरण्यादि नाना दान । जटायूअर्थीं[४] ते गति गौण । रघुनंदन स्वयें मानी ॥८२॥ शरणार्थ्यांची शरणागती । धर्मशीलाची धर्मगती । अपुनरावृत्तियाची गती । तेही रघुपति गौण मानी ॥८३॥ संन्याश्या ब्रह्मसदनप्राप्ती । आणि योग्यांची योगमुक्ती । जटायूप्राप्त्यर्थ निश्चितीं । श्रीरघुपति स्वयें गौण मानी ॥८४॥ या अवधियां गतींवरती । उत्तमोत्तम उत्तम स्थिती । परात्पर परम गती । ममाज्ञाशक्ती जाय वेगीं ॥८५॥ तुझे आज्ञेची निजशक्ती । तुझी आहे तुजप्रती । म्यां तेथें जावें कैशा रीतीं । विकल्प[५] चित्तीं धरूं नको ॥८६॥ योगयाग धर्मस्थितीं । धार्मिक जे गति पावती । ते भोगक्षयें क्षया जाती । पुनरावृत्ति[६] सर्वांसी ॥८७॥ माझिया दर्शनाचें पुण्य । कल्प गेलिया नव्हे क्षीण । तें तूं पावसी शाश्वत स्थान । सत्य वचन हें माझें ॥८८॥ जटायू ऐकें सावधान । जैसें बोलती साधारण । तैसें नव्हे माझें वचन । त्वरित गमन तूं करीं ॥८९॥ ऐसें बोलतां श्रीरामचंद्र । वैकुंठवासी चतुर्भुज नर । पीतांबरधारी शंखचक्रधर । आले सत्वर विमानस्थ ॥९०॥ विमानस्थ चतुर्भुज नर । शंखचक्र गदाधर । साष्टांगी वंदिला श्रीरामचंद्र । जोडोनि कर उभे ठेले ॥९१॥ श्रीराम म्हणे त्या पुरुषांसी । जटायू माझा पुण्यराशी । त्यासी न्यावें वैकुंठासी । अक्षयवासीं स्थापावा ॥९२॥ विमान देखतांचि पाहीं । जटायू जाला दिव्यदेही । लागला श्रीरामाच्या पायीं । म्हणे मी कायी वंदूं आतां ॥९३॥ तुझें करितांचि स्तवन । वेदशास्त्रां पडलें मौन । तेथें मी पक्षी अति दीन । गुणवर्णन काय वदूं ॥९४॥ कांही न वदणें हेंचि स्तवन । कांहीं न करणें हेंचि भजन । कांही न होणें हे प्राप्ति पूर्ण । परिपूर्ण श्रीराम ॥९५॥

जटायूने श्रीरामांना तीन वेळा प्रदक्षिणा करून विमानारोहण केले : त्रिवार करोनि प्रदक्षिणा । लागोनि श्रीरामाच्या चरणां । जटायू आरूढोनि[७] विमाना । वैकुंठभुवना निघाला ॥९६॥ वैकुंठवासिये पुरुषासी । स्वामित्व आहे रामापासीं । जटायु विस्तिम मानसीं । निघे उल्लासीं वैकुंठा ॥९७॥ पुढतापुढतीं प्रदक्षिणा । पुढतपुढतीं लागे चरणां । मग आरूढोनि विमाना । वैकुंठभुवना निघाला ॥९८॥

तात त्वं निजतेजसैव गमितः स्वर्गं व्रज स्वस्ति ते ब्रूमस्त्वेकमिमां वधूहृतकथां तातांतिके मा कृथाः ।
रामोऽहं यदि तद्दिनैः कतिपयैर्व्रीडानम्रवक्त्रः सार्द्धं बंधुजनेन सेंद्रविजयी वक्ता स्वयं राघवः ॥२५॥

---

शब्दार्थ – १. नाहीसा कर, २. सीतेकरिता, ३. सोने, आदिकरून, ४. जटायूकरिता, ५. शंका, ६. जन्मरण पावणे, ७. बसून, चढून.

निजतेजें विराजमान[१] । तेजस्वी देदीप्यमान । क्षणें पावसी वैकुंठभुवन । कृतकल्याण जटायु ।।९९।।

स्वर्गात राजे दशरथाची भेट झाल्यावर त्यांना सीताहरणाचे वृत्त न सांगण्याची श्रीरामांची जटायूला विनंती : श्रीरामें जटायु पुनीत । वैकुंठा धाडी श्रीरघुनाथ । अगाध कथा वैकुंठांत । होईल ख्यात तिहीं लोकीं ।।१००।। तुज भेटेल माझा पिता । माझी पुसेल वनवार्ता । तरी रावणें हरोनि केली सीता । हें सर्वथा नको सांगूं ।।१।। श्रीरामें उद्धरिले जटायूसी । परम आल्हाद दशरथासी । परी सीता हारविली वनवासीं । ऐकतां त्यासी अति दुःख ।।२।। जन्मोनियां सूर्यवंशीं । सीता हारविली वनवासीं । लाज लाविली सूर्यवंशासी । अति आवेशीं क्षोभेल ।।३।। मग वधावया लंकानाथ । येथें येईल दशरथ । एवढा होईल अनर्थ । सीताहरणार्थ[२] नको सांगूं ।।४।। तंव जटायु म्हणे श्रीरघुनाथा । भली हे सांगितली व्यवस्था । येऱ्हवीं मी सांगतो दशरथा । या गुह्यार्था न कळोनि ।।५।। एवढें चरित्रकथन । कैसेनि पितयास होईल ज्ञान । तरी मागून येवोनि रावण । स्वमुखें आपण सांगेल ।।६।।

ते वृत्त स्वतः रावण मागाहून सांगेल : ज्याचें मी करीन उद्धरण । तोचि येवोनि आपण । सांगेल सीतेचें हरण । कुळनिर्दळणप्रसंगें ।।७।। सपुत्रबंधुप्रधान । ससैन्येंसीं दशानन । रामें वधिला विंधोनि बण । सीताहरण करितांचि ।।८।। ऐसी ऐकतांचि वार्ता । सुख होईल श्रीदशरथा । आनंद पूर्वजां समस्तां । माझ्या पुरुषार्था देखोनि ।।९।। श्रीराम ज्ञानविज्ञापघन । ब्रह्मलिखित तुझें वचन । जटायु घालोनि लोटांगण । केलें गमन वैकुंठा ।।१०।। श्रीराम स्वयें ब्रह्म पूर्ण । जटायू भक्त संपूर्ण । करोनि पितर सनातन[३] । जटायु सुखसंपन्न पैं केला ।।११।। एकाजनार्दना शरण जालें जटायुउद्धरण । पुढें निर्दाळावया रावण । रघुनंदन चालिला ।।१२।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां जटायूद्धरणं नामैकविंशतितमोऽध्यायः ।।२१।। ओंव्या ।।११२।। श्लोक ।।१५।। एवं ।।१२७।।

## अध्याय बाविसावा

### कबंध राक्षसाचा उद्धार

पुढें मार्ग क्रमीत असताना लक्ष्मणाला अपशकुन होऊ लागतात : श्रीरामचंद्राय नमः । करोनि जटायूद्धरण । श्रीराम आणि लक्ष्मण । करावया सीतागवेषण[४] । वनोपवन शोधिती ।।१।। वन शोधितां लक्ष्मण । तंव देखता होय अपशकुन । तेणें भयें कंपायमान । सांगतां होय श्रीरामा ।।२।।

लक्ष्मणस्तं महातेजाः सत्यवांश्छीलवांश्छुचिः । अब्रवीत्प्रांजलिर्वाक्यं भ्रातरं दीनचेतसम् ।।१।।
स्पंदते मे दृढं बाहुरुद्विग्नमिव मे मनः । प्रायशश्चाप्यनिष्टानि निमित्तान्युपलक्षये ।।२।।
तत्मात्सज्जो भवार्य त्वं कुरुष्व वचनं मम । ममैव हि निमित्तानि सद्यःशंसन्ति संभ्रमम् ।।३।।

सौमित्र तेजस्वी महावीर । परनारी[५] सहोदर । सत्यवादी अति पवित्र । नित्य एकाग्र श्रीरामभजनीं ।।३।। त्यागोनियां धनमान । रामा[६] त्यजोनि श्रीरामभजन । ऐसा सौमित्र अति पावन । अशुभ चिन्ह अनुवादे[७] ।।४।। बाहु स्फुरती दुःखायमान । अशुभ लवती लोचन । तरी श्रीरामा होई सावधान । अति विघ्न दिसताहे ।।५।। सव्य[८] जाती पैं चाष । कुशब्द बोलती

शब्दार्थ - १. शोभायमान, २. सीताहरणासंबंधी हकीकत, ३. अनादिसिद्ध, ४. सीतेचा शोध, ५. परकी स्त्रियांना बहिणींप्रमाणे मानणारा, ६. स्त्री, ७. सांगू लागला, ८. डाव्या बाजूने.

वायस । दिग्दाहें कोंदले आकाश । दिसे त्रास पशुपक्ष्यां ॥६॥ ऐसें देखोनियां चिन्ह । दोघे जाले सावधान । पुढें करावया गमन । तंव दुर्धर विघ्न ओढवलें ॥७॥

वनस्य तस्य शब्दोऽभूद्वनमापूरयन्निव । तं शब्दं कांक्षमाणस्तु रामः खड्गी सहानुजः ॥४॥

श्रीरामलक्ष्मणांसन्मुख । वनीं जाली महाहाक । तेणे दुमदुमिले तिन्ही लोक । वनीं वनौक[1] गजबजिले ॥८॥ श्वापदें आक्रोशें आरडती । एक दीर्घ स्वरें गर्जती । एक मूर्च्छागत पडती । वृक्ष उन्मूळती[2] समूळीं ॥९॥ ऐसें देखोनि दोघे जण । धनुर्ध्यी सज्जोनियां बाण । वनींचे निर्दाळावया विघ्न । सावधान चालिले ॥१०॥

मार्गात जवळपास कोणीतरी राक्षस असेल तर त्याचे पारिपत्य करून पुढे जाण्याचा विचार : शुद्ध करावें दंडकारण्य । हे माझी प्रतिज्ञा संपूर्ण । तरी आधी निरसोनि येथींचें विघ्न । मग गमन पुढे करूं ॥११॥ ऐसे बोलोनि श्रीरघुनाथ । विघ्न निरसावया[3] चालिला तेथ । तंव राक्षस अत्यद्भुत । त्या वनांत देखिला ॥१२॥

ददर्श समुहाकायं राक्षसं घोरदर्शनम् । विवृद्धमशिरोग्रीवं कबंधमुदरे मुखम् ॥५॥
घोरौ भुजौ विकुर्वाणमुभौ योजनमायतौ । आकर्षंत विकर्षंतमनेकान्मृगयूथपान् ।
भक्षयंतं महाघोरानृक्षसिंहमृगद्विजान् ॥६॥

तेवढ्यात दीर्घ शरीर, लांबच लांब हात, पोटात मुख व तुटक्या पायांचा असा भयानक प्राणी दिसतो : सकंठ मस्तकीं नाहीं शिर । आकाशप्राय दीर्घ शरीर । उदरोदरीं मुख क्रूर । दाढा अत्युग्र कराळ[4] ॥१३॥ धगधगित दोन्ही नयन । अति क्रोधीं निमग्न । आणि तळवटीं भग्नचरण । बैसलें स्थान सोडीना ॥१४॥

त्याचे भीतिप्रद वर्णन : अति सलंब दोन्ही हात । एकैक बाहु योजनांत । हात दश दिशा भोंवत । कवळोनि खात पशुपक्षी ॥१५॥ मत्तमांतंगाचें[5] कळप । मुखामाजी होती गडप । सिंह व्याघ्र आस्वलें अमुप । मुखीं निक्षेप[6] दों हातीं ॥१६॥ पक्षी उडतां योजनांत । धरोनि घाली मुखाआंत । पशु वनांतरीं चरत । कवळोनि समस्त मुखीं घाली ॥१७॥ गांवगांव[7] उंच हात । अखंड गगनांत भोंवत । प्राणी त्यातें न देखत । धरोनि मुखांत स्वयें घाली ॥१८॥ क्रबंध दिसे जैसा पर्वत । गुप्त कर भोंवत गगनांत । प्राण्यांचें लक्ष नाहीं तेथ। धरोनि समस्त मुखीं घाली ॥१९॥ मारावया राम लक्ष्मण । रावणें धाडिले आठ जण । ते राक्षस महाबळिये दारुण । दोघांसी धरोन मारावया ॥२०॥ पुढिले अति गूढ विविनीं । वाट धरोनि मारावया दोनी । आठही निघाले कबंधवनीं । तंव तेणें धरोनि भक्षिले ॥२१॥ कबंधें धरोनि आठही जण । स्वेच्छा केलें त्यांचे भक्षण । मग पुढें धरावया राम लक्ष्मण । लक्ष लावोन राहिलासे ॥२२॥ शिरश्चरणरहित मध्य । यालागी नामें तो कबंध । देखोनि राम लक्ष्मण सन्निध । धरावया सिद्ध तो जाला ॥२३॥

कंबधेनातिकायेन समूढौ दीर्घबाहुना । भ्रातरौ वैरिणा प्राप्तौ कृशप्राणौ महाबलौ ॥७॥
वदतं कार्यमिह वां किमर्थं चागतौ युवाम् । इमं देशमनुप्रातौ क्षुधार्तस्येह तिष्ठतः ॥८॥

कबंधाच्या कक्षेत आल्याबरोबर राम लक्ष्मणांना ओढण्याचा त्याचा प्रयत्न : त्या दोघांतें लक्षोनी । कबंधें दोनी बाहु पसरोनी। दोहीं हातीं धरिले दोनी । आवरोनी निजबळें ॥२४॥ त्यांचें करावया भक्षण । कबंध ओढी रघुनंदन लक्ष्मण । तंव श्रीराम ओढेना[9] अणुप्रमाण । देखोनि आपण साशंक ॥२५॥

---

शब्दार्थ - १. वनचर, २. कोसळून पडू लागले, ३. नाहीसे करण्याकरिता, ४. भयंकर, ५. माजलेल्या हत्तीचे, ६. घालणे, टाकणे, ७. चार चार कोस, ८. राक्षसविशेष, हा डोक्यावाचून होता, कबंध धड, ९. ओढता येईना.

परंतु श्रीरामांना ओढता न आल्याने जिज्ञासा : मज कबंधाची निजशक्ती । आतां दोन्ही माणसें न ओढवती । तरी यांचे ठायीं दुर्धर शक्ती । याची कुळवृत्ति पुसों पां ॥२६॥ तुम्ही कोणाचे पैं कोण । आणि येथें यावया काय कारण । या ठाया जे आलेति जाण । मुख्य भक्षण तें माझें ॥२७॥

कबंधाचा पुनः आवळण्यास प्रारंभ : तंव रामासी म्हणे लक्ष्मण । राक्षसें लाविले दृढ बंधन । बळें सुटका नव्हे जाण । काय आपण करावें ॥२८॥ राम म्हणे लागल्या दृढबंधन । तरी आपणा सोडवावें आपण । दुज्याची करी जो आस जाण । हीन दीन तो नपुंसक ॥२९॥ सौमित्रा ऐकें सावचित्त । याचा पुसूंदे वृत्तांत । मग याचा करीन घात । न लागतां येथ क्षणमात्र ॥३०॥ कबंध म्हणे जरी न सांगतां वृत्तांत । तरी मी तुमचा करीन घात । मग हांसोनियां श्रीरघुनाथ । निजवृत्तांत सांगत ॥३१॥

श्रीराम स्वतःचा वृत्तांत कबंधाला सांगतात : अरे मी दाशरथि रघुनंदन । रावणें केले सीता हरण । तिचे करावया गवेषण[1] । दोघे जण येथें आलों ॥३२॥ तव दीर्घबाहु निमग्नवदन[2]। विक्राळरूपी कैचा कोण । मार्ग रोधावया[3] काय कारण । निजलक्ष्मण मज सांगें ॥३३॥ हेंचि माझें निजवृत्त । तूं म्हणसील भक्षावें म्या येथ । बाहुबळें आकर्षित । दोघे मुखांत घालावया ॥३४॥ कबंध अति क्रोधानळीं । दोघांतें ओढी सबळ बळी । बाहु उखळूं पाहती समूळीं । परी बंधूंची जाळी ओढेना ॥३५॥ तंव लक्ष्मण म्हणे श्रीरघुनाथा । हा तंव पेटला निजघाता । तरी यासी वधावें शीघ्रता । विलंब आतां करूं नये ॥३६॥

त्याचे बाहू कापण्याची लक्ष्मणाला आज्ञा : श्रीराम सांगे आपण । यासी तंव नाहींत चरण । बाहुबळें हा सबळ पूर्ण । त्या आपण छेदाव्या ॥३७॥ आम्हां दोघांतें धरोनि येथे । याचे यानें गोविले हात । तरी त्याच्या भुजा छेदोनि येथ । सावचित्त निजखर्गें ॥३८॥

दक्षिणो दक्षिणं बाहुमासक्तमसिना ततः । चिच्छेद रामो वेगेन सव्यं वीरस्तु लक्ष्मणः ॥९॥
स पपात महाबाहुश्छिन्नबाहुर्महास्वनः । खं च गां च दिशश्चैव नादयञ्जलदो यथा ॥१०॥
स निकृत्तौ भुजौ दृष्ट्वा शोणितौघपरिप्लुतः । दीनः पप्रच्छ तौ वीरो कौ युवामिति दानवः ॥११॥

खर्ग काढोनिं सावचित्त । श्रीरामें छेदिला दक्षिण हस्त । आणि लक्ष्मणें त्याचि क्षणांत । वाम हस्त छेदिला ॥३९॥ भुजा छेदिल्या महा थोर । तंव वाहती रुधिराचे[4] पूर । राक्षस अति आक्रंदे थोर । तेणें चराचर दुमदुमिलें ॥४०॥ नाद कोंदला अंतराळीं । नाद कोंदला सप्त पाताळीं । नादें पक्षी श्वापदें आंदोळी[5] । बैसली टाळी दिग्गजां ॥४१॥ घायें राक्षस कंपायमान । तुम्ही दोघे काय राम लक्ष्मण । केलें माझ्या भुजांचें छेदन । आणिकांसी जाण न तुटती ॥४२॥ अतर्क्य माझ्या भुजा जाण । लक्षूं जाणे श्रीराम लक्ष्मण । आणिका न करवे छेदन । मूर्च्छापन्न देखोनि ॥४३॥ आणिकां न कळे माझी गोष्टी । आणिक मज देखतां दृष्टीं । मूर्च्छापन्न पडती सृष्टीं । ते उठाउठीं[6] मी भक्षीं ॥४४॥ माझ्या भुजांचें बळ संपूर्ण । ओढितां न ओढती दोघे जण । आणि बळें बाहूंचें केले छेदन । तरी राम लक्ष्मण तुम्ही दोघे ॥४५॥ तुमचा घाव लागतां देख । दुःख नासूनि वाटे सुख । श्रीराम सौमित्र तुम्ही आवश्यक । अलोलिक निजशक्ति ॥४६॥ ऐसें ऐकोनि राक्षसवचन । सौमित्र सांगे आपण । आम्ही दोघे श्रीराम लक्ष्मण । सीतागवेषणे[7] करूं आलों ॥४७॥

---

शब्दार्थ - १. शोध, २. छातीत डोकें आहे असा, ३. अडविण्यास, ४. रक्ताचे, ५. हालवू लागला, ६. तत्काळ, ७. सीतेचा शोध.

त्वं तु को वा किमर्थं वा कबंधसदृशो वने । आस्येनोरसि दीप्तेन भग्नजंघो विचेष्टसे ॥१२॥

लक्ष्मणाच्या प्रश्नावरून कबंधाने आपला वृत्तांत सांगितला : तंव लक्ष्मण पुसे राक्षसासी । तरी तूं कोण येथें वनवासी । शिरश्चरणेंवीण कबंधेंसीं । येथें रहावयासी काय कारण ॥४८॥ कोथळ प्रचंड चरणेंवीण । येथे कैसें आगमन । आणि उदरीं दिसे क्रूर वदन । दीर्घ दर्शन विकराळ ॥४९॥ येथें तुझ्या मुखाहातीं[१] । पशुपक्ष्यां जाली शांती । कवळोनि श्वापदें दोन्हीं होतीं । ऐसा अति क्षुधार्थी तूं कोण ॥५०॥

एवमुक्तः कबंधस्तु लक्ष्मणेनोत्तरं वचः । उवाच वचनं प्रतिस्तदिदं वचनं स्मरन् ॥१३॥

श्रिया विराजितं पुत्रं दनोस्त्वं विद्धि लक्ष्मण ।

रूपमासीन्ममाचिन्त्यं त्रिषु लोकेषु विश्रुतम् । सोऽहं रूपमिदं कृत्वा लोकवित्रासनं महत् ॥१४॥

ऐकोनि लक्ष्मणाचें वचन । राक्षस स्वयें संतोषोन । मग आपुलें पूर्वविधान । स्वयें सावधान सांगत ॥५१॥ कश्यपाची प्रियपत्नी । दिती अदिती आणि दनी । जे कां रूपें श्रीसमानी[२] । ते माझी जननी श्रीरामा ॥५२॥

कश्यपभार्या दनीचा पुत्र दनू स्थूलशिरा ऋषीच्या शापाने कबंध राक्षस झाला : तरी त्या दनूचा पुत्र मी प्रिय पूर्णु । यालागीं मातें म्हणती दनु । रूपें मदनमोहनु । सबळें पूर्णू बळवंत ॥५३॥ रूपयौवनसंपत्ती[३] । अंगीच्या बळाची उद्धती । नानावरदविकटवृत्ती । ऋषी वनांतीं भेडसावीं ॥५४॥

ततः स्थूलशिरा नाम महर्षिः कोपितो मया । स चिन्वन्विविधं वन्यं रुपेणानेन धर्षितः ॥१५॥

तेनाहमुक्तः प्रेक्ष्यैवं घोरशापाभिधायिना । एतदेवं नृशंसं ते रूपमस्तु विगर्हितम् ॥१६॥

स मयाः याचितः क्रुद्धः शापस्यांतो भवेदिति । यदा छित्वा भुजौ रामस्त्वां दहेद्विजने वने ।

तदा त्वं प्राप्यसे रूपं स्वमेव विपुलं शुभम् ॥१७॥

स्थूळशिरा महाऋषीसी । वनीं वेंचितां वनफळांसी । मी अधोमुखें भेडसावीं त्यासी । तंव तेणें क्रोधावेशीं शापिलें ॥५५॥ विक्राळ मुखयोजन[४] कर । चरणरहित स्थूळ शरीर । उदरामाजी निमग्न शिर । होसी अघोर राक्षस ॥५६॥ मग त्याचे धरोनि चरण । उश्शाप मागितला आपण । करितां सीतागवेषण । राम लक्ष्मण वना येती ॥५७॥ त्यांसीं तूं धरितां भक्षणार्थी । ते दोघे दोन्ही बाहु छेदिती । तेव्हां तूं पावसी उद्धारगती । ऐसी वरदोक्ति ऋषि वदला ॥५८॥ आणिक एक माझी उद्धती[५] । ते मी सांगे तुम्हांप्रती । मज तुष्टला प्रजापती[६] । तपोनुवृत्ती[७] संतोषोनी ॥५९॥

अहं हि तपसोग्रेण पितामहमतोषयम् । दीर्घमायुः स मे प्रादात्ततो मां बिभ्रमोऽस्पृशत् ॥१८॥

दीर्घमायुर्मया प्राप्तं किं मां शक्रः करिष्यति । इत्येवं बुद्धिमास्थाय रणे शक्रमधर्षयम् ॥१९॥

तस्य बाहुप्रमुक्तेन वज्रेण शतपर्वणा । सक्थिनी च शिरश्चैव शरीरे संप्रवेशितम् ॥२०॥

ब्रह्मदेवाच्या वराने दीर्घायुष्य मिळविले : तपें प्रसन्न केला विधाता । ब्रह्मशाप निवारीं म्हणतां । द्विजशापीं न चले सामर्थ्यता । म्हणे नान्यथा ऋषिभाषित[८] ॥६०॥ न निवारवे ऋषिशापासी । मग मागितलें दीर्घायुष्यासी । ब्रह्मयानें देवोनि त्या वरासी । अदृश्येसीं तो गेला ॥६१॥ व्हावया ब्रह्मशापप्राप्ती । गर्व वाटला माझे चित्तीं । मी तंव चिरंजीव त्रिजगतीं । इंद्रादि किती मजपुढें ॥६२॥

त्या वराच्या उन्मत्तपणाने इंद्राशी केलेल्या युद्धात इंद्राने त्याला विद्रूप केला : ऐसिया गर्वाची

---

शब्दार्थ – १. मुखाकडून, २. लक्ष्मीसारखी, ३. अत्यंत सौंदर्य आणि तारुण्य यांनी शोभणारा असा, ४. चार कोस लांब, ५. दांडगाई, ६. ब्रह्मदेव, ७. तपश्चर्येवर, ८. ऋषीचे भाषण.

उद्धती । घ्यावया त्याची स्वर्गसंपत्ती । जाली इंद्रपदाची प्राप्ती । मज शचीपति[1] कोपला ॥६३॥ मज आयुष्य आहे संपूर्ण । इंद्र मारावया मशक कोण । येणेंचि अति गर्वें जाण । युद्ध दारुण म्यां केलें ॥६४॥ तीक्ष्ण वज्र शतधारा । घायें हाणीतल्या पुरा । शरीर निमग्न केलें शिरा । चरण धारा खंडिले ॥६५॥ घायें दुःखी जालों अत्यंत । इंद्रासी म्हणे मी न करीं घात । तंव तो म्हणे तूं चिरंजीवित । जीविता अंत घडेना ॥६६॥ ऐसें बोलतां सुरपती । मज आली ब्रह्मशापप्राप्ती । क्षणामाजी पडली भ्रांती । अति उन्मत्ती राक्षस ॥६७॥ उदरोदरीं दिधले मुख । अति विक्राळ आणि विकट । दोनी हात योजन एक । अति अगाध अनिवार ॥६८॥ जें जें सांपडे हातांत । पशु पक्षी प्राणी नित्य भक्षित । तरी क्षुधेसी नाहीं अंत । समसमित अति दुःखी ॥६९॥ नवल कैसें श्रीरघुनाथा । काय खाऊं हे चिंता । आणिक नाठवेचि सर्वथा । उदरावस्था अति दुःखी ॥७०॥ पोटाचिये चिंतेहातीं । जगासी पडली अति भ्रांती । हृदयीं नाठवे श्रीरघुपती । ऐसा दुःखावर्त[2] उदरार्थ ॥७१॥ वेदशास्त्रीं अति संपन्न । स्वयें म्हणवीं मी सज्ञान । तरी शिश्नोदरपरायण । इतर जन ते शमक ॥७२॥ असो इतरांची काय कथा । माझी जे कां दुःखावस्था । सावध ऐकें श्रीरघुनाथा । मोक्षदाता तूं माझा ॥७३॥

ममाप्यनेन रूपेण निर्वेदः सुमहान्प्रभो । मृत्पिण्डभूत एकस्थो जीवलोकविगर्हितः ॥२१॥
दीर्घौ चमौ निकृत्तौमे युवाभ्यामायतौ भुजौ । राघवौ सन्मया दृष्टौ नास्ति धन्यतरो मया ॥२२॥
सत्यसंधौ तथा वीरौ धार्मिकौ सत्यविक्रमौ । सहितौ भ्रातरौ दृष्ट्वा मुक्तोहं पापजीवितात् ॥२३॥

श्रीरामदर्शनाने त्याचा उद्धारकाळ समीप आला : या देहाचे संगतीं । अति दुःखी मी रघुपती । मृत्पिंडप्राय[3] नाहीं गती । निंद्य सर्वार्थी सर्वस्वें ॥७४॥ यासी नाहीं गमनगती । नाहीं अंतरीं शुद्धमती । बाह्य क्रिया जीवघाती । निंद्य सर्वार्थी सर्वस्वें ॥७५॥ मारोनि खावे जीवमात्र । न म्हणें ब्राह्मण क्षत्रिय शुद्र । ऐसा राक्षस मी अपवित्र । दुःखें दुर्धर अति दुःखी ॥७६॥ तरी शापभाग्यास्तव[4] जाण । तुम्ही आलेति दोघे जण । तरी हें नव्हे सीतागवेषण । माझें उद्धरण करूं आलां ॥७७॥ करितां माझे बाहुच्छेदन । छेदिला माझा देहाभिमान । घायें केलें सावधान । सुखसंपन्न श्रीरामा ॥७८॥ तुम्ही दोघे पूर्ण पुरुष । सत्वनिष्ठ सद्विवेक । तुमचे चरण सुखदायक । सदा सात्विक तुमचेनि ॥७९॥ ऐसे तुम्ही धीर वीर । सत्स्वरूप महाशूर । तुम्ही निजधर्माचें माहेर । चिदचिन्मात्र[5] तुम्ही दोघे ॥८०॥ तुम्हांसी देखतांचि दृष्टीं । निमाल्या[6] अविद्या पापें कोटी । सुखस्वरूपीं झाली भेटी । कृपाळु सृष्टीं श्रीराम ॥८१॥ तुम्ही दोघे अलौकिक । तुमच्या चरणां ओळंगतां[7] देख । दुःख छेदोनि दिधलें सुख । परम पुरुष तुम्ही दोघे ॥८२॥ पापकारी अति निंदित । राक्षययोनीं अधःपात[8] । त्या मज केलें निर्मुक्त । ब्रह्मभूत तुम्ही दोघे ॥८३॥

कबंधाच्या विनंतीवरून त्याचे दहन केले : ऐसें बोलोनि आपण । कबंध घाली लोटांगण । माझें केलिया देहदहन । सांगेन संपूर्ण सीताशुद्धि ॥८४॥ सीताशुद्धि मी सांगेन । हें ऐकोनि श्रीरामवचन । त्यासी पुसे स्वयें आपण । अति सावधान शुद्ध्यर्थी ॥८५॥

स त्वं सीता समाचक्ष्व येन वा यत्र वाहृता । कुरु कल्याणमत्यर्थं यदि जानासि तत्वतः ॥२४॥

श्रीराम पुसे कबंधासी । सीताशुद्धि सांगेन म्हणसी । कोणीं नेली कोणे स्थळासी । कोणे

शब्दार्थ – १. इंद्र, २. दुःखरूप भोवरा, ३. मातीच्या गोळ्याप्रमाणे, ४. शापरूपी भाग्यामुळे. ५. सर्व चराचरस्वरूपी, ६. नाहीशा झाल्या, गेल्या, ७ सेवा केली असतो, ८. नरकवास

देशीं तें सांगें ॥८६॥ बुद्धि करोनि सावधान । स्वस्थ करोनि निजमन । सीतेचें केउतें गमन । स्थान मान मज सांगें ॥८७॥

एवमुक्तस्तु रामेण वाक्यं दनुरनुत्तमम् । इदं जगाद वचनं लक्ष्मणस्य च पश्यतः ॥२५॥
रावणेन हृता सीता रामपत्नी यशस्विनी । नाममात्रं तु जानामि न रूपं तस्य रक्षसः ॥२६॥
निवासं वा प्रभावं वा वयं तस्य न विद्महे । दिव्यमस्ति न मे ज्ञानं नाभिजानामि मैथिलीम् ॥२७॥

सीतेला रावणाने नेली हे कबंधाने रामांना सांगितले : ऐसें ऐकोनि श्रीरामवचन । कबंध सांगे आपण । ऐसें मज आहे ज्ञान । तें सावधान अवधारीं ॥८८॥ मग लक्ष्मणासी उभे करोनी । कबंध सांग गर्जोनी । श्रीरामाची धर्मपत्नी । गेला घेवोनी रावण ॥८९॥ त्याचें नांव म्यां ऐकिलें कानीं । परी तो देखिला नाहीं नयनीं । ते केउता गेला गगनीं । कोणे स्थानीं मी नेणें ॥९०॥ त्याचा आवास ना निवास[१] । कोणे ठायीं रहिवास । जनवास कीं वनवास । तें मी निःशेष जाणें ना ॥९१॥

विज्ञानं तु परिभ्रष्टं शापदोषेण राघव । स्वकृतेन मया प्राप्तं रूपं लोकविगर्हितम् ॥२८॥
किं तु यावन्न यात्यस्तं सविता श्रांतवाहनः । तावन्मामवटे कृत्वा दह राम यथाविधे ॥२९॥

श्रीरामा माझें शुद्ध ज्ञान । ब्रह्मशापें जालें विच्छिन्न । न करितां राक्षसदेहाचें दहन । माझें मज ज्ञान प्रकटेना ॥९२॥ आच्छादावया निजज्ञान । श्रीरामा मुख्य देहबंधन । देहाभिमान केलिया दहन । ज्ञानविज्ञान प्रांजळ ॥९३॥ यालागीं राक्षसीदेहदहन । दीर्घ गर्तेत[२] खाणून । त्यामाजी शुष्क काष्ठें घालून । करावें दहन सौमित्रें ॥९४॥ अंतकाळ करी जो मित्र । तयाचें नाम गा सुमित्र । मी तंव तुमचें कृपापात्र । श्रीरामचंद्र कृपाळु ॥९५॥ लक्ष्मणा ऐकें सावधान । या देहा नाहीं प्रेतपण । श्रीरामहस्तें अति पावन । कृपेनें दहन करीं स्वामी ॥९६॥ केलिया राक्षसदेहदहन । सीताप्राप्तीचें विधान । मी यथार्थ सांगेन । सत्यवचन श्रीरामा ॥९७॥ ऐकोनि कबंधाचें वचन । संतोषला रघुनंदन । पाचारोनि लक्ष्मण । देहदहन करविलें ॥९८॥

चितामादीपयामास सा प्रजज्वाल सर्वतः । तच्छीरीरं कबंधस्य घृतपिण्डोपमं महत् ॥३०॥
स विधूय चितामाशु विधूमोऽग्निरिवोत्थितः । अरजे वससि बिभ्रन्माल्यं दिव्यं महबलः ॥३१॥
उत्पपाताशु संहृष्टः सर्वप्रत्यंगभूषणः । विमाने भास्वरे तिष्ठन्हंसयुक्ते यशस्करे ॥३२॥

कबंधाचें देहदहन । चितेमाजी करतां जाण । तो निंद्य देह त्यागून । जाला आपण दिव्यदेही ॥९९॥ दिव्यांबरपरिधान[३] । अनर्घ्य भूषणें दिव्य चंदन । मांदार पारिजात सनातन । माळा परिधान मघमघित ॥१००॥ त्यजितां राक्षसदेहासी । दनुदानव उल्लासेंसीं । श्रीरामा तुझी कृपा ऐसी । निमेषार्धेंसीं सुखी केलें ॥१॥ तुझें देखिलिया श्रीचरण । चरणां शरण सायुज्य ॥२॥ त्यांत तुझें सांग संदर्शन । मज धडलें संपूर्ण । म्हणोनि घालितां लोटांगण । आलें विमान हंसयुक्त ॥३॥ धन्य द्विजाचा निजशाप । शापें केला निष्पाप । श्रीराम भेटला चित्स्वरूप । सुखरूप मी जालों ॥४॥ सुखरूप चराचर । सुखें भरले सागर । कबंधासी उत्साह थोर । श्रीरामचंद्र संतुष्टला ॥५॥ कबंध अति उल्लासोनि । बैसला हंसयुक्त विमानीं । सीताप्राप्तीचे विधानीं । स्वयें गर्जोनि सांगत ॥६॥

सोऽन्तरिक्षगतो वाक्यं कबन्धो राममब्रवीत् । शृणु राघव तत्त्वेन यथा सीतामवाप्स्यसि ॥३३॥
श्रूयतां राम वक्ष्यामि सुग्रीवो नाम वानरः । भ्रात्रा निरसतः क्रुद्धेन वालिना शक्रसूनुना ॥३४॥

---

शब्दार्थ – १. रहाण्याचे ठिकाण, २. खांचेंत, ३. उत्तम वस्त्रे धारण केलेला.

दहन झाल्यावर विमानात बसून कबंध श्रीरामांना सुग्रीवाशी सख्य करण्यास सांगतो : कबंध बैसोनि विमानीं । श्रीरामा सांगे कळवळोनी । सीताशुद्धीचे[१] विधानीं । सावधानीं अवधारीं ॥७॥ ऐकें श्रीरामा सत्योत्तर । सीता भेटावया अति सत्वर । सुग्रीवासी करीं मित्र । वानर वीर महाबळीं ॥८॥ पालेखाइरे[२] वानर । केंवळ नव्हती वनचर । किंष्किंधेचा राज्यधर । सैन्य अपार जयाचें ॥९॥ सुग्रीवाचें[३] चवघे प्रधान । राजनीतीं अति संपन्न । चहू पुरुषार्थी अति सज्ञान । बळवाहन बळिष्ठ ॥११०॥

दोघांचे दुःख एकच असल्याने उभयता मैत्रीस योग्य : समानशीळ योग्य मैत्री । येरयेरां नित्यसाहाकारी । तुम्हां दोघां समान सरी । तेहीं अवधारीं श्रीरामा ॥११॥ तुझी भार्या रावणें हरण । सुग्रीवभार्या वाळिग्रहण । दोघांची अवस्था समसमान । दोघे दीन स्त्रीविरहें ॥१२॥ तुज राज्यत्यागें प्राप्त वन । त्यासी राज्यत्यागें ऋष्यमूक स्थान । दोघाचें दुःख समसमान । अति दीन स्थिति गति ॥१३॥ तुम्ही नरपति सुग्रीव वीर । आणि वानरपति सुग्रीव वीर । त्यासीं करावा अगत्य मित्राचार[३] । सीतासुंदरीप्राप्त्यर्थीं ॥१४॥ हें तंव मानलें श्रीरामा वचन । केउतें सुग्रीवाचें स्थान । कोणे मार्गे करावें गमन । श्रीरघुनंदन पुसतसे ॥१५॥

स वानरवरः पंपामटतीव सुशंकितः । अभिषिक्तो बलौ कर्तुं कार्यं ते हरिपुंगवः ॥३५॥
वानरेंद्रो महावीर्यस्तेजोवानमितप्रभः । दिशो विचेतुं तां सीतां त्वद्वियोगेन शोचतीम् ॥३६॥
भास्करस्यौरसः पुत्रो वालिना कृतकिल्बिषः । सन्निधायायुधं क्षिप्रमृष्यमूकालयं कपिम् ॥३७॥

पंपासरोवरावर सुग्रीवाची भेट व मैत्री होईल : कबंध सागें श्रीरामाप्रती । येणेंचि मार्गे श्रीरघुपती । पंपासरोवराची ख्याती । अति विश्रांति तापसां[४] ॥१६॥ देखिलिया पंपेचें दर्शन । दुःखी होती सुखसंपन्न । तें त्या वानराचें स्थान । स्वानंदें पूर्ण क्रीडती ॥१७॥

वालीचा वध घाल्यावर मैत्री होऊन सीतेचा शोध लागेल : तुज सुग्रीवा जालिया भेटी । दोहींच्या दुःखा होईल तुटीं । मेळवोनि वानरकोटी । सीता गोरटी शोधील ॥१८॥ वानर धाडोनी महाबळीं । त्रैलोक्यीं घेतील घरधांडोळी । ठायीं[५] घालोनि[५] जनकबाळी । वानर तत्काळीं येतील ॥१९॥ सीताविरहें तूं आपण । गिंवसिसी[६] गिरिकंदरें वन । तिची शुद्धि वानरगण । न लागतां क्षण आणिती ॥१२०॥ स्त्रीविषयींचें सुबद्ध । वाळिसुग्रीवां महाद्वंद्व[७] । सहा सहा मासां करिती युद्ध । वीरां उन्माद वाटिव[८] ॥२१॥ तुझेनि हातें वाळिमरण । हें मज आहे ज्ञान पूर्ण । शीघ्र जावोनि आपण । वाळिनिर्दळण करावें ॥२॥ त्या दोघांच्या युद्धसंधीसीं । ठाकोनि जावें त्वरेंसीं । रणीं निर्दाळावया वाळीसीं । सुख सुग्रीवासी स्वानंदें ॥२३॥ जें वाळीचें निर्दळण । तेंचि सुग्रीवा मित्रत्व पूर्ण । तेणें तूं पावशील कल्याण । सत्य वचन श्रीरामा ॥२४॥ बंधुबंधूंमाजी वैर । पडावया मुख्य स्त्री साचार । स्त्रीसंग मुख्य दुर्धर[९] । दुःखी नर स्त्रीसंगें ॥१५॥ सुग्रीव मित्राचें महिमान । पावसील सीतारत्न । कीर्ति प्रकटेल अति पावन । सत्यवचन श्रीरामा ॥२६॥ ऐसें कबंधें सांगोनी । स्वये श्रीरामासी वंदोनी । आल्हादें विमानीं बैसोनी । उर्ध्वगमनीं तो गेला ॥२७॥ एकाजनार्दना शरण । जालें कबंधोद्धरण । पुढें श्रीरामलक्ष्मण । पंपाप्रयाण स्वयें करिती ॥२८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां कबंधोद्धरणं नाम द्वाविंशतिमोऽध्यायः ॥२२॥ ओव्या ॥१२८॥ श्लोक ॥३७॥ एवं ॥१६५॥

---

शब्दार्थ – १. सीताशोधासंबंधी, २. झाडांची पाने खाणारे, ३. मैत्री, ४. तपस्वी लोकांना, ५. शोध लावून, ६. शोधशील, ७. मोठे भांडण, ८. पुरुषार्थ, बळ, ९. दुःसह.

# अध्याय तेविसावा

## शबरीचा उद्धार

**पंपासरोवरावर विश्रांती :** श्रीरामचंद्राय नमः । कबंधरूपें दानव दनु । पावला होता राक्षसतनु । तो श्रीरामें उद्धरोनु । केला पावनु तिहीं लोकीं ॥१॥ दनूनें केलें उर्ध्वगमन । पुढे श्रीराम लक्ष्मण । पंपेसी निघाले आपण । धनुष्यबाण सज्जोनी ॥२॥

पंपायाः पश्चिमे तीरे उपविष्टो च राघवौ । ददर्शतुस्ततस्तत्र शबर्या रम्यमाश्रमम् ॥१॥

तौ तमाश्रममासाद्य द्रुमैर्बहुभिरावृतम् । सुरभ्यमभिवीक्षंतौ शबरीमभ्युपेयतुः ॥२॥

तौ दृष्ट्वा तु तदा सिद्धा समुत्थाय कृताञ्जलिः । पादौ जग्राह रामस्य लक्ष्मणस्य च धीमतः ॥३॥

श्रीराम लक्ष्मण अति सत्वर। पावोनि पंपापश्चिमतीर[1] । सेवोनियां पंपापवित्रनीर । विश्रांतीस वीर बैसले ॥३॥

**शबरीच्या आश्रमास भेट, शबरीने केलेले स्वागत :** तेथें शबरीचा आश्रम । देखोनि अति मनोरम । स्वयें आले सौमित्र राम । आल्हाद परम शबरीसी ॥४॥ श्रीरामचरणीं लोटांगण । भावें वंदिला लक्ष्मण । शबरीसी आल्हाद पूर्ण । श्रीरामदर्शन देखोनि ॥५॥ मातंगऋषीच्या सेवावृत्तीं[2] । शबरीची शुद्धमती । भगवद्भाव[3] सर्वां भूतीं । श्रीरामीं भक्ति अनन्य[4] ॥६॥ मातंगऋषीचे शिष्य निर्मळ । पडला असता अति दुष्काळ । गुरूसी आणिती फळ मूळ । स्रवले केवळ श्रमबिंदु ॥७॥ श्रमबिंदु पडतां जाण । जालीं सरोवरें पावन । आटों नेणे तेथींचे जीवन । नित्य परिपूर्ण शुद्धजळें ॥८॥ श्रद्धेने सेवितां तेथींचें आप । तत्काळ शमे त्रिविध ताप । सांसारिक शमे संताप । सुखरूप स्वानंदें ॥९॥ एकाचे बिंदु पडतां क्षितीं । सुमनें झालीं नाना जाती। सुकों नेणती कल्पांतीं । नित्य टवटविती मघमघित ॥१०॥ त्या सुमनांचा घेतां वास । मनाचा निरसे त्रिगुणत्रास । मग भोगी प्रकट पेरश । अति उल्लास जीवशिवां ॥११॥ तिहीं पुष्पीं सुपुष्ति । वनश्री शोभासौभाग्ययुक्त । तें दखोनि श्रीराम संतोषत । अति भावार्थ शबरीचा ॥१२॥ देखोनि शबरीचा भावार्थ । संतोषला श्रीरघुनाथ । मग तिचा वृत्तांत पुसत । समाधानार्थ द्यावया ॥१३॥

कच्चित्ते निर्जिता विघ्नाः कच्चिते वर्धते तपः ॥ कच्चिते नियतः कोप आहारश्च तपोधने ॥४॥

कच्चित्ते नियमाः प्राप्ताः कच्चित्ते मनसः सुखम् । कच्चिते गुरुशुश्रूषा सफला चारुभाषिणि ॥५॥

**रामाचा शबरीस उपदेश व प्रश्न :** श्रीराम पुसे आपण । शबरी तूं ऐकें सावधान । मी एक ज्ञाता जग अज्ञान । हें महाविघ्न जिंकिलें कीं ॥१४॥ ज्ञानाचा ज्ञानाभिमान । हेंचि तापसां महाविघ्न । जेणें जिंतिला ज्ञानाभिमान । तप वर्धमान तयाचें ॥१५॥ तयाच्या तपाची थोरी । स्वयें भगवंत आज्ञाधारी । तोचि तपस्वी या संसारीं । सुरासुरीं वंदिजे ॥१६॥ अद्वैत देखिलें स्वस्वरूप। तैंचि जिंतिला जाय कोप । असतां द्वैतखटाटोप । सर्वथा कोप जिणवेना ॥१७॥ जो पुढिलाचे ढक्यानें पडे । त्यावरी तो कोपें वावडे । स्वयें निसरोनि गडबडे । झाडितु मागें पुढे उगाचि निघे ॥१८॥ स्वजिव्हा रगडितां दातांबुडीं । तया कोपाची कडाडी । दात पाडी कीं जिव्हा तोडी । तैसी अद्वैतीं सवडी कोपासी नाहीं ॥१९॥ जंव

---

शब्दार्थ - १. पंपा सरोवराचे शुद्ध पाणी, २. सतत सेवा केल्याने, ३. प्राणिमात्राचे ठिकाणी भगवत्प्रेम ठेवणारी, ४. एकनिष्ठ, ५. आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक हे तीन ताप, ६. सत्व, रज आणि मत ह्या तीन गुणांचा त्रास, ७. वाढणारे, ८. उभेदरूप, ९. जिंकवत नाही, १०. बडबडतो, ओरडतो, ११. चावता.

द्वैताची सुदृढता । तंव जिंकवेना मोहममता । अद्वैतभावना भावितां । मोहममता निमाली ॥२०॥ वृत्ति पावल्या चित्स्वरूप । तै मन होते सुखरूप । मनीं असतीं दुःखसंताप । केल्याही तप अति मिथ्या ॥२१॥ तरी सद्गुरुसेवा सफळ । संसार होय मृगजळ । ऐसें न पावती ते बरळ । गुरु केवळ अनोळख ॥२२॥ जे गुरूसी मनुष्य मानिती । त्यांची मिथ्या गुरुभक्ती । त्यांसी कल्पांतीं नव्हे विश्रांती । उपदेशें भ्रांति मुख्यत्वें ॥२३॥ मंत्र तंत्र जे सांगती । ते तोंडींचें तोंडीं उपदेशिती । नाहीं अंतरीं निजप्रतीती[१] । उपदेशभ्रांति मुख्यत्वें ॥२४॥ सुवर्णाचा म्हणती नाग । नाग नव्हे तें सोनें चांग । तेंवी दृष्य द्रष्टा दिसे सांग । उपदेश अव्यंग[२] या नांव ॥२५॥ ऐसिये निजात्मप्रतीती । आहे सकळ गुरुभक्ती । सांडोनि[३] ज्ञानगर्वउद्धती । विनीत[४] सर्वांभूतीं अहेतुक[५] ॥२६॥ इंद्रियकर्मांची प्रवृत्ती । तुज आहे कीं अकर्त्रात्मप्रतीती[६] । तैं सकळ वासनां होय शांती । सुखस्थितिस्वानंद ॥२७॥ ऐसी निजानंदप्रतीती । या नांव सार्थक तपःस्थिती । निजदेह मिथ्यात्वें देखती । मुख्य परमार्थी तो एक ॥२८॥ ऐसें श्रीरामें पुसतां । शबरीस झाली पूर्णावस्था । श्रीरामचरणीं ठेवोनि माथा । समस्त तत्त्वत्तां वृत्तांतां सांगत ॥२९॥

अद्य प्राप्ता तपः सिद्धिस्तव संदर्शनान्मया । अद्य मे सफलं जन्म गुरवश्च सुपूजिताः ॥६॥
चित्रकूटं त्वयि प्राप्ते विमानैरतुलप्रभैः । मुनयो दिवमारूढा ये मयाभ्यर्चिताः पुरा ॥७॥
तैश्चाहमुक्ता धर्मज्ञैर्महाभागैर्महात्मभिः । आगमिष्यति काकुत्स्थः सुपुष्पामिदमाश्रमम् ॥८॥
मया तु संचितं वन्यं विविधं पुरुषर्षभ । तवार्थे पुरुषव्याघ्र पंपायास्तीर संभवात् ।
तत्ते परिगृहीतव्यं राम सौमित्रिणा सह ॥९॥

शबरीचे उत्तर, श्रीरामास तेथे राहाण्याची विनंती : तुझें होतांचि दर्शन । सफळ तप सफळ ज्ञान । सकळ ध्येय ध्याता ध्यान । सफळ अनुष्ठान आजि माझें ॥३०॥ आजि माझी सफळ वृत्ती । आजि माझी सफळ स्थिती । आजि माझी सफळ भक्ती । जे कृपें रघुपति आलासी ॥३१॥ तुझें करितां नामस्मरण । सहित पूर्वजां उद्धरण । त्या तुझें जालिया दर्शन । सफळ जनन आजि माझें ॥३२॥ तुझे देखिलिया चरण । जन्ममरणांची बोळवण[७] । बोळविलें मीतूंपण । सुखसंपन्न श्रीरामें ॥३३॥ तुज येतां चित्रकूटींहूनी । मार्गीं उद्धरिलें मुनी । शरभंगु जातां विमानीं । म्यां प्रार्थोनि पूसिलें ॥३४॥ तेणें सांगितलें मजप्रती । तुझ्या आश्रमा येईल श्रीरघुपती । तैंपासोनि अहोरात्रीं । चरण चित्तीं दृढ धरिले ॥३५॥ माझा जाणोनि भावार्थ[८] । कृपेनें आलासी कृपावंत । तरी आजि राहोनियां येथ । पूजा यथोक्त अंगीकारीं ॥३६॥ सूक्ष्म सामग्री अति पुनीत । म्यां किंचित केली असे येथ । तें अंगीकारावी श्रीरघुनाथ । सखा समवेत सौमित्र ॥३७॥ ऐसें ऐकोनि शबरीवचन । संतोषला श्रीरघुनंदन । विधियुक्त पूजा अंगीकारोन । वनभोजन स्वयें केलें ॥३८॥

वचनात्तस्य सा रामं शबरी वाक्यमब्रवीत् । कृत्स्नं वनमिदं दृष्टं श्रोतव्यं च श्रुतं त्वया ॥१०॥
तदिच्छाम्यभ्यनुज्ञाता त्यक्षाम्येतत्कलेवरम् । तेषामिच्छाम्यहं गंतुं समीपं भावितात्मनाम् ॥११॥

---

शब्दार्थ – १. आत्मानुभव, २. परिपूर्ण, ३. ज्ञानाभिमानाचा ताठा, ४. अत्यंत नम्र. ५. निरिच्छतेने, ६. मी कर्ता नाही असा अनुभव, ७. शेवट, अंत, ८. एकनिष्ठ भक्ती.

श्रीरामांनी शबरीची स्तुती केली : संतोषोनी बोलिला श्रीरघुनाथ । जें दनुजमुखें तुझें सामर्थ्य । ऐकोनि आम्ही आलों येथ । तुझें आचरित[1] पहावया ॥३९॥ दनुदानवें[2] जें सांगितलें । त्याहूनि अधिक म्यां देखिलें । ऐसे श्रीरामें बोलिलें । मन आनंदले शबरीचें ॥४०॥ सद्गुरुमंत्रसामर्थ्य पूर्ण । कदा कोमेजना हें वन । सुमनां[3] न ये सुकलेपण । न आटे जीवन[4] बहुकाळें ॥४१॥ सद्गुरूचें सामर्थ्य भले । जैसें ऐकिलें तैसें देखिलें । त्याचें वचन म्यां पाळिलें । तेणें देखिले हे पाय ॥४२॥ ऐसें बोलोनि उल्लासतां । श्रीरामचरणीं ठेविला माथा । कांहींएक मी मागेन आतां । दयावंता तें देईं ॥४३॥ तुझें घ्यावया दर्शन । धरिलें देहाचें धारण । तरी तुझें देखिलिया चरण । कार्य कोण देहाचें ॥४४॥

शबरीची प्रार्थना : तरी तुज देखतां श्रीरघुनाथा । गेली देहाची मोहममता । तो मी त्यागीन जीव आतां । कृपावंता आज्ञापीं ॥४५॥ देहसंगतीं अमित दोष । देहसंगति तो श्वानओक । देह तोचि महा नरक । परम दुःख देहसंगें ॥४६॥ देहाचिये संगतीं । ऐशीं दुखेः नेणों किती । देहसंगाची करीन निवृत्ती[6] । कृपें रघुपति आज्ञापीं ॥४७॥

रामांची अनुमती व शबरीचा उद्धार : ऐसें शबरियें स्वयें प्रार्थून । घातलें चरणीं लोटांगण । देखोनि तुष्टला रघुनंदन । आज्ञा संपूर्ण स्वये देत ॥४८॥

धर्मिष्ठं तु वचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः । अनुजानामि गच्छेति प्रहृष्टवदनोऽब्रवीत् ॥१२॥
अनुज्ञाता तु रामेण हुत्वात्मानं हुताशने । ज्वलत्पावकसंकाशा स्वर्गमेव जगाम ह ॥१३॥
यत्र ते सुकृतात्मानो विहरंति महर्षयः । तत्पुण्यं शबरी स्थानं जगामात्मसमाधिना ॥१४॥

ऐकोनि शबरीच्या वचनासी । श्रीराम बोले अति उल्लासीं । सांडोनियां देहलोभासी । परलोकासी सुखें जाय ॥४९॥ ऐकोनियां श्रीरामवचन । शबरी घालोनियां आसन । निजतेजासी चेतवोन । केलें दहन देहाचें ॥५०॥ श्रीरामपुण्याची निजशक्ती । जाळोनियां देहस्थिती । शबरीसी कोण लोकप्राप्ती । तेही गती अवधारा ॥५१॥ जैसें पुण्याचें सामर्थ्य । ऋषि तैसे लोक पावत । शबरी पापपुण्यातीत । अति समर्थ श्रीरामें ॥५२॥ श्रीरामदर्शनाचें पुण्य । दिव्य भोगें नव्हे क्षीण । शबरी पावली अक्षय स्थान । गमनागमन[8] जेथ नाहीं ॥५३॥ ऋषीश्वरांच्या पुण्यसंपत्ती । भोगक्षयें क्षया जाती । ते पावती पुनरावृत्ती । शबरीस प्राप्ती ते नाहीं ॥५४॥ जेथें नित्य वस्ती श्रीशुका । जेथें वस्ती सनकादिकां । शबरी पावली तया लोका । शिवादिकां निजपूज्य ॥५५॥ श्रीरामदृष्टि पुण्य परिपूर्ण । देहदहने देदीप्यमान । तिसी न लागेचि विमान । केलें गमन निजगतीं ॥५६॥ जे जाती विमानगतीं । ते पावती पुनरावृत्ती । ते नाहीं शबरीप्रती । अगम्यगती ते गेली ॥५७॥ श्रीरामदर्शन पुण्यसंपत्ती । अक्षय सुखाची सुखवस्ती । क्षया न वचे कल्पांतीं । निजप्राप्ती शबरीसी ॥५८॥ श्रीराम देखतांचि दृष्टीं । पापपुण्यां पडली तुटी । खुंटली जन्ममरणांची गोष्टी । अक्षय संतुष्टी शबरीसी ॥५९॥ स्वयें श्रीराम कृपामूर्ती । शबरी तरली सुखानुभूतीं । स्वर्गी जयजयकार करिती । सुमनें वर्षती सुरसिद्ध ॥६०॥ यापरी शबरीउद्धरण । श्रीरामें केलें आपण । एकाजनार्दना

---

शब्दार्थ - १. वर्तन, २. कबंध राक्षसाने, ३. फुलांना, ४. उदक, ५. मोठ्या आनंदाने, ६. नाश, ७. त्या शबरीने, ८. जन्ममरण.

शरण । जगदुद्धरण श्रीराम ॥६१॥ शबरीआश्रम अतिविश्रांत । राम लक्ष्मण बैसोनि तेथ । वनशोभा स्वयें पहात । तंव अपूर्व तेथ वर्तलें ॥६२॥

वनशोभा पाहात असता श्रीरामांचा चित्तक्षोभ : देखोनि मृगशावाक्षिवदनां[1]। सीता आठवली मृगनयना । मदन क्षोभला श्रीरघुनंदना । मनमोहना श्रीरामा ॥६३॥ श्रीराम नित्य निष्काम । त्यासी क्षोभला अति काम । काम निष्कामआक्रम । कामसंभ्रम अवधारा ॥६४॥

मां हि शोकसमाक्रान्तं संतापयति मन्मथः । हृष्टः प्रवदमानश्च मामाह्वयति कोकिलः ॥१५॥

वसंतें वन शोभायमान । कोकिलांचें पंचम आलापन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । सकाम संपूर्ण सीतार्थी ॥६५॥

एष दात्यूहको हृष्टो रम्ये काननिर्झरे । प्रणदन्मन्मथाविष्टं शोचयिष्यति लक्ष्मण ॥१६॥

ज्यांच्या ज्यांच्या कूजन-क्रीडेमुळे श्रीरामांना मनस्ताप झाला त्यांना त्यांना शाप व उःशाप-कोकिळा : नव्हे हें कोकिळाकूजन[2]। हे मदनाचे दुर्धर बाण । हृदयीं विंधिती दारुण । द्वंद्वं[3] संपूर्ण हा करितो ॥६६॥ लक्ष्मणा करीं गां निवारण । कोकिळा न सांडिती कूजन । माझें नायके हा वचन । रघुनंदन कोपला ॥६७॥ याचें खुंटो वदतें वचन । यासी पडो दृढ मौन । रागें क्षोभे रघुनंदन । शाप दारुण स्वयें वदला ॥६८॥ कोकिळा विनवी अति दीन । सर्वेचि तुष्टला रघुनंदन । वसंतीं तुज मधुर वचन । येऱ्हवीं मौन सर्वदा ॥६९॥

मां दृष्ट्वैव मृगो याति तं मृगी परिधावति । वक्ष्यती वनभीः कामैः कामैरर्धा मृगीरयम् ॥१७॥

हरिण : लक्ष्मणा माझे सन्मुख दृष्टीं । मृग रमतो मृगीपाठीं । मज काम क्षोभोनि हठी । द्वंद्वदृष्टी हो माझा ॥७०॥ माझ्या मूर्खत्वाच्या गोष्टी । सांगतो मृगीच्या कर्णपुटीं । सीता हारविली गोरटी । मूर्ख सृष्टीं श्रीराम ॥७१॥ पशु पक्षी काग कपोता । स्त्रीपासोनि नव्हे परता । वनीं सांडोनि गेला सीता । मुख्य मूर्खता श्रीरामीं ॥७२॥ हातींची हारवोनि सीता । वनीं रडत भोवतो आतां । श्रीरामऐसी मूर्खता । मज सर्वथा असेना ॥७३॥ मी सांडोनि निजकांता । श्रीरामऐसा न वचें परता । ऐसिया माझ्या निंद्य कथा । मृग सांगतो मृगीपासीं ॥७४॥ देखोनि मृगाचें मैथुन । श्रीरामें शापिला अति क्षोभून । तुज करितां दारगमन । घायें प्राण जातील ॥७५॥ ऐकोनि दुर्धर शापोक्ती । मृग श्रीरामा ये काकुळती । सर्वेचि तुष्टला कृपामूर्ती । शापनिवृत्ति स्वयें वदे ॥७६॥ घंटापारधीचे[4] रातीं । घायें तुमचे प्राण जाती । येरवीं विचरतां स्त्रियेप्रती । । सुखसंभूति स्वानंदें ॥७७॥

हत्ती व हत्तीण : उन्मत्त कामें कामगज । गजीसीं क्रीडे देखोनि मज । मज सीतेची लावोनि लाज । नाचे भोजें[5] स्त्रीसंगें ॥७८॥ जेंवी मी प्रेमें आश्वासीं सीता । तेंवी तो सोंड ठेवितो गजीचे माथां । मज उपहासितो रघुनाथा । स्त्रीकामता उन्मत्त ॥७९॥ सीता पुसतां गजासी । कांही न बोले श्रीरामासी । गज क्रीडतो निजगजीसीं । तेणें श्रीरामासी कोप आला ॥८०॥ श्रीरामें क्षोभोनि आपण । शाप दिधला दारुण । गजीसीं करितां कामरमण । स्त्रीसंगे प्राण जाईल ॥८१॥ गजी गज दीनवदन । दोघें प्रार्थिती रघुनंदन । त्यांचेनि वचनें संतोषोन । शापमोचन स्वयें वदला ॥८२॥ गजीसीं करितां मैथुन । तूं पडसी अचेतन । गजीनें माथां

---

शब्दार्थ - १. हरिण बालकांचे डोळे व मुख, २. कोकिळेचे ओरडणे, ३. वैर, ४. गीत-वाद्यादिकांच्या साहाय्याने हरिणांना मोहवून भुलवून जाळ्यांत पकडणारा, पापशुद्ध करणारा तो घंटापारधी, षष्ठीचा संबंध घायें या पदाकडे, ५. सुखानें.

घालितां जीवन[1] । तुझा प्राण वांचेल ॥८३॥ गती तुज पुरवील तृण । त्याचे केलिया भक्षण । सातां दिवसां सावधान । वनविहरण तूं करिसी ॥८४॥ तया नांव गजोपशेज । ऐसें मिरविसील भोज[2] । ऐकतां सुखी जाला गज । तेणें सहजें सुख जालें ॥८५॥ अद्यापि गजगजीमैथुन । तेथें हें चालतें विंदान । बाप विनोद श्रीरघुनंदन । विचित्र विंदान करितसे ॥८६॥

शिखिनीभिः परिवृतास्त एते मदमूर्च्छिताः । मन्मथाभिपरीतस्य मम मन्मथवर्धनाः ॥१८॥

पश्य लक्ष्मण नृत्यंतं मयूरमुपनृत्यति । शिखिनी मन्मथार्तैषा भर्तारं गिरिसानुषु ॥१९॥

मोर व लांडोरी : पाहें पां लक्ष्मणा येथ । मयूरी मयूरसंयुक्त । नृत्य करी मन्मथोन्मत्त[3] । मजही कामार्त करोनी ॥८७॥ मयूराची निजपत्नी । नाहीं राक्षसीं नेली हिरोनी । म्हणोनि नाचे गिरीकाननीं । वांकुल्या दुरोनि मज दावी ॥८८॥ म्यां सीता हारविली वनीं । मज दुःखितातें देखोनी । हा नाचतो घेवोनि पत्नी । रामें कोपोनि शापिला ॥८९॥ मज दुखितातें देखतां । दोघें नाचती उन्मत्तता । तुज येईल नपुंसकता । अंगसंगता तुम्हां न घडे ॥९०॥ ऐकोनियां शापवचन । मयूर विनवी अति दीन । मयूरीनें धरिले चरण । शापमोचन श्रीराम वदे ॥९१॥ सीतेचे वियोगें जाण । दुःखी होसी तूं रघुनंदन । आम्हां पक्षियांचा पाड कोण । दुःख दारुण पहावयासी ॥९२॥ ऐसें ऐकोनि मयूरवचन । श्रीराम जाला सुप्रसन्न । दोघे नृत्यमानें सुखसंपन्न । चक्षुवीर्यें पूर्ण सुख तुम्हां ॥९३॥

कावळा : पाहें पां लक्ष्मणा विपरीत । काळा कावळा पत्नीसमवेत । मज दुःखितां वांकुल्या दावित । स्वयें क्रीडत पत्नीसीं ॥९४॥ श्रीराम सीता पुसे कागासी[4] । दोघें न बोलती श्रीरामासीं । श्रीरामें क्षोभोनि आवेशीं । त्या दोघांशी शापिलें ॥९५॥ जन्मामध्यें एकदा जाण । तुम्हां दोघां होय मैथुन । पुढतीं न घडे स्त्रीगमन । होती संपूर्ण कागवंध्या ॥९६॥ अद्यापि कागाच्या कागदेहीं । दुसरा गर्भसंभव[5] नाहीं । कागवंध्या म्हणती पाहीं । लोकीं तिहीं कागासी ॥९७॥

चक्रवाक-चक्रवाकी : श्रीराम चक्रवाकें देखता नयनीं । एकत्र विचरती पैं दोनी । परती नव्हेती अर्धक्षणीं । गमनागमनीं एकत्र ॥९८॥

एक एव सुखी लोके चक्रवाको विहंगमः । पश्य दृष्ट्या मनोरम्या छाययानुगता प्रिया ॥२०॥

या लोकीं सुखे सुखिया । पाहतां दिसे चक्रवाकिया । रूपासवें जैसी छाया । तैसी भार्या अनुगत ॥९९॥ चक्रवाकीसी सांगे कथा । श्रीरामें हारविली सीता । मी पत्नीसीं नव्हें परता । श्रीराममूर्खता मज नाहीं ॥१००॥ वनीं एकली सांडी कांता । मुख्य मूर्खत्व याचे माथां । हें ज्ञान नाहीं श्रीरघुनाथा । निजमूर्खता विलपत[6] ॥१॥ श्रीराम मूर्खशिरोमणी । कां गेला निजपत्नी सांडोनी । तिजलागीं अति दुःखी होवोनी । वनोवनीं हिंडत ॥२॥ निजपत्नीसीं क्रीडतां । देखोनियां पुढिलाचिया एकांता । क्षोभ उपजे श्रीरघुनाथा । उपशांतता धरीना ॥३॥ श्रीराम सीता पुसे त्यांसी । ते न बोलती श्रीरामासीं । वियोग पावाल अहर्निशीं । चक्रवाकांसी शापिलें ॥४॥ चक्रवाकें तळमळती । दीनें येती काकुळती । आमची अवधारीं विनंती ।

---

शब्दार्थ - १.उदक, २. आनंद, ३. कामविकाराने, उन्मत्त होऊन, ४. कावळ्याला, ५. दुसरी गर्भोत्पत्ती, ६. आपल्या स्वतःच्या मूर्खपणाने शोक करतो.

कृपामूर्ति श्रीरामा ।।५।। सीतेची वियोगगती । तुज न साहवे श्रीरघुपती । तो वियोग आम्हां-प्रती । कैसिया रीतीं कंठवे ।।६।। याहूनि श्रीरघुनाथा । अवश्य करी आमच्या घाता । तुझेनि हातें मारतां । सुखरूपता आम्हांसी ।।७।। सुखें सोसेल अंगभंग । परी न साहवे स्त्रीवियोग । विनंति ऐकतांचि चांग । श्रीराम अव्यंग[१] तुष्टला ।।८।। दिवसा दोघां अंगसंगती । वियोग पावाल पैं रातीं । परी वियोगीं योग शब्दसंगतीं । शापनिशर्मुक्ति श्रीरामें ।।९।। श्रीराम पंपातीरीं । सीताविरहाचे अंतरीं । वदला विचित्र कुसरी[२] । लीलावधारी श्रीराम ।।११०।। मिथ्या सीतावियोगप्राप्ती । मिथ्याचि ती विरहशक्ती । सत्यत्वें दावी श्रीरघुपती । शापोपहती अनुवादे ।।११।। सर्वां भूतीं श्रीराम सद्रूप । मिथ्या वियोग मिथ्या शाप । मिथ्या विरहाचा प्रताप । चित्स्वरूप[३] श्रीराम ।।१२।। श्रीराम ज्ञानविज्ञान अभिव्यक्ती । श्रीराम निर्विकल्प ब्रह्ममूर्ती । श्रीराम चिन्मात्र दाशरथी । सीतापत परब्रह्म ।।१३।। सीता ध्येय श्रीराम ध्यान । सीता ज्ञेय श्रीराम ज्ञान । सीता चेतना श्रीराम चैतन्य । दोनी अभिन्न एकत्वें ।।१४।। श्रीराम चित्स्वरूपस्थिती[४] । वर्णितां शास्त्रें मौनावती । श्रुति परतल्या नेति नेती । माझी वचनोक्ति ते काय ।।१५।। पुढील कथानुसंधान । येथोनि ऋष्यमूकातें गमन । करावया सुग्रीवासीं सौजन्य । श्रीरघुनंदन उद्यत[५] ।।१६।।

ऋष्यमूको गिरिर्यत्र नातिदूरे प्रकाशते । यस्मिन्वसति धर्मात्मा सुग्रीवोंऽशुभतः सुतः ।।२१।।

**ऋष्यमूक पर्वताकडे :** लक्ष्मणा पाहें सावचित्त । हा ऋष्यमूक महापर्वत । येथोनि समीप दिसत । सुशोभित फळीं पुष्पीं ।।१७।।

**ऋष्यमूक असे का म्हणतात? :** ऋषींनी यज्ञ याग केले येथ । यालागीं ऋष्यमूक यातें म्हणत । सुग्रीव वसताहे तेथ । प्रधानयुक्त भयभीत ।।१८।।

**वालीच्या भीतीने सुग्रीवाने या पर्वताचा आश्रय घेतला :** वाळिभयें भयभीत । सुग्रीव वसे ऋष्यमूकांत । वाळीस ऋषि शाप देत । नव्हे सामर्थ्य तेथ यावया ।।१९।। सुग्रीवाची घ्यावया भेटी । तेथोनि निघाला उठाउठीं । वाळिभयाची निवटोनि गोष्टी । देऊं सुखसंतुष्टी सुग्रीवा ।।१२०।। भार्या हरोनि सुंदरी । वाळीनें सुग्रीव गांजिला भारी । श्रीराम गांजिल्याचा कैवारी । धनुर्धारी कृपाळु ।।२१।।

**अरण्यकांडाची सारांशरूप उजळणी :** संपलें अरण्यकांडकोड । किष्किंधाकांड अति गोड । त्या कथेचे सुख सुरवाड[६] । श्रोते वारंवार परिसती ।।२२।। पुरवोनि भरताचे कोड[७] । पादुका देवोनि सुरवाड । त्याचें प्रेम वाढवोनि गोड । अरण्यकांड संपविलें ।।२३।। विराध राक्षस प्रचंड । ज्याचें रावणा भय उदंड । श्रीरामें त्यासी करोनि दुखंड । अरण्यकांड संपविलें ।।२४।। शरभंगु महामुनि वाड । भेटी देवोनि केला निवाड । देवोनियां निज सुरवाड[८] । अरण्यकांड संपविलें ।।२५।। संघा (सांबा) करोनि दुखंड । शूर्पणखेचें नासिकाखंड । सकर्ण विंटबोनि तोंड । अरण्यकांड संपविलें ।।२६।। पंचवटीं रण वितंड । खरदूषणां छेदोनि मुंड[९] । त्रिशिराचें ठेंचोनि तोंड । अरण्यकांड संपविलें ।।२७।। मायामृगें छळितां दृढ । कपटी मारीच मारिला

---

शब्दार्थ – १. परिपूर्ण, २. चमत्कार, चातुर्य, ३. चैतन्यरूप, ४. ज्ञानमूर्ती, ५. तयार, आनंदपरिपूर्ण, ७. इच्छा, ८. मोठा, श्रेष्ठ, ९. शिर.

सुदृढ । जाणोनि भविष्याचें वाड । अरण्यकांड संपविलें ॥२८॥ रावणें जटायु खंडवितंड । दुःखें पसरोनि पाडिला तोंड । श्रीरामें सुखी करोनि अखंड । अरण्यकांड संपविले ॥२९॥ सीताशुद्धीचें कैवाड[1] । विलासरूप श्रीराम गोड । पुरवोनि पार्वतीचें कोड । अरण्यकांड संपविले ॥१३०॥ एकाजनार्दना शरण । श्रीरामें शबरीउद्धरण । केलें अरण्यकांड संपूर्ण । परिपूर्ण श्रीरामें ॥३१॥ कबंधाचे छेदोनि बंध । तोही मुक्त केला शुद्ध । एकाजनार्दनीं परमानंद । स्वानंदकंद[2] श्रीराम ॥३२॥ संपलें अरण्यकांड गोड । पुढें किष्किंधाकांड अति प्रचंड । श्रोते परिसोत निवाड । सुखसुरवाड[3] रामायणीं ॥३३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे अरण्यकांडे एकाकारटीकायां शबरीउद्धरणं नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥२३॥ ओंव्या ॥१३३॥ श्लोक ॥२१॥ एवं ॥१५४॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु॥

## अरण्यकांड समाप्तम्

शब्दार्थ - १. मिष; कैवार, २. निजानंदाचा केवळ गड्डाच, ३. सुखाचा सुकाळ.

श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## किष्किंधाकांड

### अध्याय पहिला

।। श्रीगणाधिपतये नमः ।।

।। श्रीगुरुभ्यो नमः ।।

।। श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।।

### श्रीराम- हनुमंत भेट

आदित्यान्वयसागरे दशरथः स्वातीजलं निर्मलं कौसल्याजठराख्यशुक्तिपुटके श्रीराममुक्ताफलम्।
तन्नीलं हृदाये हरेण पदकं सम्यग्धृतं सूज्वलं सच्छत्रं स्मरणेन शंकरसमं प्राप्तोति भाग्यं जनः ।।१।।
सच्चिदानंदरूपाय जनार्दनस्वरूपिणे । स्वप्रकाशाय शुद्धाय आचार्याय नमो नमः ।।२।।
मायातीताय नित्याय मायागुणप्रकाशिने। व्यक्ताव्यक्तस्वरूपाय आचार्याय नमो नमः ।।३।।

श्री एकनाथांचे आत्मनिवेदन : अरण्यकांडा झालें निरूपण[1]। श्रीरामें केलें संपूर्ण। आतां किष्किंधाकांडकथन। श्रीरघुनंदन स्वयें वदवी ।।१।। माझ्या अंगीं मूर्खपण । त्या मजकरवीं रामायण। श्रीराम वदवी आपण। निग्रहूनि[2] निजबळें ।।२।। सांडोनि रामकथालेखन। मजकरितां गमनागमन। मार्गीं श्रीराम रामायाण। स्वयें संपूर्ण प्रकाशी ।।३।। करूं बैसतां भोजन। ग्रासोग्रासीं स्मरे रघुनंदन। मागें घालूनि जेवण। राम रामायण स्वयें वदवी ।।४।। पाहों जातां निस्वभावीं। श्रीराम रामायण स्वयें वदवी । ओंवीचढीत दाउनी ओंवी। कथा वदवी श्रीराम ।।५।। बोलों जातां फुकट काहणी। तेचि रामकथा होय वाणी। वाचा खिळिली[3] रामायणी। वचनावचनीं श्रीराम ।।६।। निजलों असतां स्वप्नीं पूर्ण। श्रीराम दाखवी रामायण। आपुलें गुह्यनिरूपण।

शब्दार्थ : १. विवरण, कथन, २. भाग पडून, ३. व्याप्त झाली.

सांगे आपण बोलोनी ॥७॥ केलें असता[1] सुषुप्तिशयन[1]। श्रीराम थापटी पाठी आपण। म्हणे लिहीं वेगीं रामायण। वृथा निजोन लाभ कायी ॥८॥ रामायण लिहावयासाठीं। श्रीरामें पुरविली पाठी। श्रीराम संचरोनि पोटीं। दाटोदाटीं[2] लिहवीत॥९॥ मी तंव निजनिद्रा डुल्लत। ग्रंथ लिहविता श्रीरघुनाथ। माझ्या कवित्वाचा इत्यर्थ। कर्ता समर्थ श्रीराम॥१०॥ काय नेणों श्रीरघुनाथा। माझी आवडे मऱ्हाठीं कथा। बळात्कारें होया वदविता। न करितां राहों नेदी॥११॥

पूर्वीचे कथानुसंधान, शबरीचा उद्धार करून श्रीराम-लक्ष्मण किष्किंधेकडे निघाले: तें पूर्वकथानुसंधान। करूनि शबरीउद्धरण। किष्किंधेसी राम लक्ष्मण। दोघे जण चालिले॥१२॥

तौ तु दृष्ट्वा महात्मानौ भ्रातरा रामलक्ष्मणौ। वरायुधधरौ वीरौ सुग्रीवः शंकितोऽभवत्॥४॥
उद्विग्नहृदयः सर्वा दिशः समवलोकयन्। न व्यतिष्ठत कस्मिंश्चिद्देशे वानरपुंगवः॥५॥
नैव चक्रे मनः स्थातुं वीक्ष्यमाणौ महाबलौ। कपेः परमभीतस्य चित्तं व्यवससात ह॥६॥

रामलक्ष्मणांना सशस्त्र आलेले पाहून, त्यांना आपल्याला मारण्यासाठी वालीनेच पाठविले असावे असा सुग्रीवाचा गैसमज, त्यामुळे घाबरून तो गुहेत लपतो : क्रमोनियां[3] दुर्धर वन। वीर धीर ते दोघे जण। घेवोनियां धनुष्यबाण। श्रीराम लक्ष्मण पातले॥१३॥ इंद्रादि देवां हें दुर्गम वन। येथें पायीं आले दोघे जण। सुग्रीव म्हणे आपण। योद्धे दारुण हे दोघे॥१४॥ आम्हां कपींतें[4] देखती। मनुष्यें चळाचळां कांपती। हे निःशंक आम्हांसन्मुख येती। दुर्धर शक्ति या दोघां ॥१५॥ मज मारावया जाण। वाळीनें आणिले दोघे जाण। तापसवेषें दोघे जण। मारेकरी पूर्ण हे माझे॥१६॥ ऐसें बोलोनि प्रधानांप्रती। सुग्रीव भयभीत चित्तीं। येथील सांडावी शीघ्र वस्ती। शीघ्रगतीं पळावें ॥१७॥

ततः सुग्रीवसचिवा दृष्ट्वा परमधन्विनौ। जग्मुर्गिरितटात्तस्मादन्यच्छिखरमुत्तमम् ॥७॥
ते क्षिप्रमभिगम्याथ यूथपा यूथपर्षभम्। हरयो वानरश्रेष्ठं परिवार्योपतस्थिरे ॥८॥
एवमेकायनगताः प्लवमाना गिरेर्गिरिम्। प्रकंपयंतो वेगेन गिरीणां शिखराणि च ॥९॥

ऐसें सुग्रीव बोलोन। दृष्टीं देखतां राम लक्ष्मण। वेगीं करोनि उड्डाण। पळे आपण गिरिगव्हरीं[5] ॥१८॥ सुग्रवासवें चौघे प्रधान। आणिक वानर लहानसान। अवघे सवेग पलायमान। वनें उपवनें लंघिती॥१९॥ एक रिघाले गिरिकंदरीं। एक पळाले पर्वतशिखरीं। श्रीराम देखोनि धनुर्धारी। आनाना[6] परी वानरां॥२०॥ सबळ वानरांच्या उड्डाणीं। वृक्ष पडती उन्मळोनी[7]। पर्वतकडे पडती धरणीं। महापळणी वानरां ॥२१॥ सुग्रीव राजा पैं आपण। गुहेंसी रामभयें बैसोन। तेथें आले चौघे प्रधान। कोण कोण ते ऐका ॥२२॥ नळ नीळ जांबवंत। चौथा प्रधान हनुमंत। जो कां सबळ बळें विख्यात। तो स्वयें पुसत सुग्रीवा॥२३॥ तूं राजा सबळ सृष्टीं। दोघे मनुष्य देखोनि दृष्टीं। कां पळालासी उठाउठीं[8]। त्या भयाची गोष्टी मज सांगें ॥२४॥ सुग्रीवस म्हणे हें वन दुर्धर। रिघों न शकती सुरासुर। येथें पायीं आले दोघे वीर। धनुर्धर महाबळी॥२५॥ वेढिलें चीरकृष्णाजिनांबर। तापसवेषी अति सुंदर। त्यांपासीं कैसे चाप शर। मारेकर वाळीचे॥२६॥ मज मारावयासाठीं। वाळीनें आणिले हे कपटी। तें भय घेवोनियां पोटीं। उठाउठीं पळालों॥२७॥ त्यांची होतां आठवण। माझे जावों पाहती प्राण। तेणें भयें पलायमान। हें सत्य जाण हनुमंता॥२८॥ आणिक एक हनुमंता जाण। वाळीस असे शापवचन। ऋष्यमूकपर्वतीं करितां गमन। पावसी मरण निश्चयेंसीं ॥२९॥ दोघे वीर देखतां दृष्टीं। धैर्य न धरवे माझ्या पोटीं। बळें सांडवली सृष्टी। उठाउठीं पळालों ॥३०॥ म्हणोनि हे साहाकारी[9]। दोघे आणिले धनुर्धारी। निर्भय येताती देखोनि उदरीं। भय निर्धारीं वाटत॥३१॥

शब्दार्थ : १. गाढ झोपेत असतां, २. त्वरेने, ३. चालून जाऊन, ४. वानरांना, ५. पर्वताच्या गुहेत, ६. वेगवेगळ्या तऱ्हा, रीती, ७. उपळून, ८. ताबडतोब, ९. साह्यकारी, मदतनीस.

हें कारण समजल्यावर हनुमंताला आश्चर्य : त्यांची होतां आठवण । जाऊं पाहे माझा प्राण । तेणें भयें पलायमान । सत्यवचन हनुमंता ॥३२॥ ऐकोनि सुग्रीवाचें वचन। हनुमंत हांसिन्नला आपण । मी मंत्री असतां बळवान। भय कोण तुज राया ॥३३॥ जरी तूं मज आज्ञा देसी । तरी मी जाईन त्या दोघांपासीं। समूळ आणीन वृत्तांतासी । कोणे कार्यासी येथे आले ॥३४॥

त्यांचे वृत्त आणण्यासाठी हनुमंताला सुग्रीवाची संमती : ऐसें बोलतां हनुमंत। संतोषला वानरनाथ[१]। त्या दोघांचा निजवृत्तांत। मज साद्यंत सांगावा ॥३५॥ दोघे धनुर्वाडे संपूर्ण । तुज मारितील विंधोन बाण। आपला वांचवोनियां प्राण । वृत्तांत संपूर्ण आणावा॥३६॥ ते तूं म्हणसी साधारण। महायोद्धे अति निपुण। त्यांची ऐकिली म्यां आंगवण। सावधान अवधारीं॥३७॥ ताटका सुबाहु मारिले पूर्ण। मारीच मारिला विंधोनि बाण। त्रिशिरा आणि खर दूषण। घेतला प्राण विराधाचा॥३८॥ तिहीं मिळोनि दोघीं जणीं। कबंध मारिला अर्धक्षणीं। मी पळालों त्यांसी देखोनि। दुर्धर दोनी महावीर ॥३९॥

फार सावधपणे राहून माहिती आण, हनुमंताचे प्रयाण : यालागीं त्यांपासीं जातां। सावधान असावें हनुमंता। वांचवोनियां निजजीविता । त्यांच्या वृत्तांता आणावें ॥४०॥ आज्ञा देता सुग्रीव वीर । हनुमंत निघाला सत्वर। पुढे देखतां श्रीरामचंद्र । झाले विचित्र तें ऐका ॥४१॥ जन्मतां अंजनीच्या पोटीं । हनुमंताची सबळ पुष्टी। नव्हता श्रीरामासीं भेटी । करील सृष्टी अनन्य ॥४२॥ हनुमंताची सबळता । देखोनि ब्रह्मया अति चिंता । तेणें युक्ति केली स्वतां । तेही व्यवस्था अवधारा॥४३॥ वानरभ्रमाचियें भ्रांतीं । ब्रह्मा लोपी हनुमंतशक्ती। भेटतां श्रीरामाची मूर्ती । निजबळप्राप्ती पावेल हा ॥४४॥

आईच्या सांगण्याचे मारुतीला स्मरण : ऐसें ब्रह्मयाचें वचन। मिथ्या नव्हे अणुप्रमाण। देखतांचि श्रीरघुनंदन। बळवाहन हनुमंत ॥४५॥ देखतांचि श्रीराममूर्ती । हनुमान पावला सबळ शक्ती ।एकला नाटोपे त्रिजगतीं। हे प्रतीति[२] पावला ॥४६॥ करितां सुग्रीवाचा कार्यार्थ[३]। दृष्टी देखतां श्रीरघुनाथ । हनुमान पावला पुरुषार्थ । समर्थता निजशक्ती ॥४७॥ स्वामी मानूं सुग्रीव वीर । तंव तो भ्याड पालेखाइर[४]। माझा स्वामी कोण साचार । पुसे निर्धार अंजनीसी ॥४८॥ तुझे गर्भीची निजलंगोटी। नैष्ठिक[५] ब्रह्मचर्यासी[५] कांसोटी। जो देखेल निजदृष्टीं। तो तुज सृष्टीं निजस्वामी ॥४९॥

मातुर्वाक्यं तु विज्ञाय हनूमान्मारुतात्मजः । पर्वतान्मलयात्तूर्णं पुप्लुवे यत्र राघवौ ॥१०॥

लक्ष्मणाचे मांडीवर श्रीराम विश्रांती घेत होते त्याच झाडावर मारुती बसला : ऐकोनि मातेचें वचन । हनुमंतें करोनि उड्डाण। शीघ्र आला आपण । राम लक्ष्मण जे ठायीं ॥५०॥ दोघे बंधु धनुर्धारी। शीतळ छाया तरुवरीं । श्रीराम लक्ष्मणाचें मांडीवरी। निद्रा करी स्वभावें ॥५१॥ त्याचि वृक्षावरी हनुमंत। येवोनि बैसलासे गुप्त। दोघांचें पहावया चरित्र। दिसे अतर्क्य तिष्ठत ॥५२॥

श्रीरामांचे लक्ष झाडावर जाताच वरील वानराला जन्मजात ब्रह्मचर्य-कौपीन असल्याचे त्यांनी बोलून दाखविले : श्रीराम आश्चर्यें सांगे गोष्टी। लक्ष्मणा पाहें ऊर्ध्वदृष्टीं । वानरा ब्रह्मचर्यकांसोटी। सगर्भ पोटीं आभासे[६]॥५३॥ ऐकोनि श्रीरामवचन । हनुमान जाला हास्यवदन। दोघे मानव दुःखी दीन । स्वामी संपूर्ण केंवी मानूं ॥५४॥ सेवक सबळ[७] स्वामी निर्मळ। तें स्वामित्व समूळ विकळ[८]। तरी त्यांचे आंगी किती बळ । पाहों परीक्षा अनुमाने॥५५॥

श्रीराम आपली माहिती थोडक्यात मारुतीला सांगतात : माझ्या स्वामित्वाच्या अर्था। पाहों

शब्दार्थ : १. सुग्रीव, २. अनुभव, ३. कार्यभाग, ४. पाला खाणारा, ५. कडकडीत ब्रह्मचर्य हीच कांसोटी, ६. दिसते, ७. बळवान्, ८. व्यर्थ.

याचिया पुरुषार्था । शालवृक्ष घेवोनि हाता । आला रघुनाथसन्मुख ॥५६॥ देखतां श्रीरामाचे चरण। अजरामर मी आपण। आठवलें पूर्वस्मरण। जन्ममरण मज नाहीं ॥५७॥ श्रीराम देखतांचि दृष्टीं । हनुमंतासीं आनंदकोटी । पुसावया वृत्तांतगोष्टी। हर्ष पोटीं न समाये ॥५८॥ तुम्ही दोघे कैंचे कोण। येथें यावया काय कारण । समूळ न सांगतां जाण । घायें प्राण घेईन ॥५९॥ हनमंतप्रश्नाचा आक्रम । वरीवरी कोप अंतरी प्रेम । हें जाणोनि रघूत्तम । निजानुक्रम[1] सांगत ॥६०॥ मी दाशरथी रघुनंदन । धाकुटा बंधु हा लक्ष्मण । सीता माझी भार्या जाण । वनाभिगमन पितृवाक्यें ॥६१॥

त्यांचे कर्तृत्वाची कसोटी हनुमंत पाहातो : शून्याश्रमीं पंचवटीं । रावणें हरिली सीता गोरटी। त्या सीतेच्या शुद्धीसाठीं[2]। उठाउठीं येथ आलों ॥६२॥ ऐसें बोलतां श्रीरघुनाथ । सर्वांगीं उल्लासें हनुमंत । दोहींचा कळला वृत्तांत । यांचा पुरुषार्थ पाहों पां॥६३॥ वीर्य धैर्य शौर्य बळ । कोण वाटीव[3] कैसें शीळ[4] । हेंही शोधावया सकळ । कलहो प्रबळ मांडिला ॥६४॥ लक्षोनियां रघुकुळटिकळ । वानरें देवोनियां विकट[5] हांक । शालवृक्ष सोडिला देख । अति सन्मुख सक्रोध ॥६५॥

श्रीराम पडल्या पडल्याच शांतपणे मारुतीच्या शस्त्रास्त्रांचे निवारण करतात : तंव लक्ष्मण सवेग उठी । धनुष्यबाण सज्जोनी मुष्टीं । वानर देखतां सबळ सृष्टीं । कडकडाटीं लोटला ॥६६॥ शयनींचा नुठेचि रघुनंदन । उठों नेदितांचि लक्ष्मण। निजेलिया विंधोनि बाण । केला शतचूर्ण शालवृक्ष ॥६७॥ मग हनुमंत कोपेंकरीं। हाणी शतानुशत तरुवरीं। निजल्या विंधोनि शरधारीं। क्षणामाझारी छेदिले॥६८॥ मग क्रोधें चालला पंचपर्वती। एक पुच्छीं दोनी दो हातीं । दोनी दोहीं स्कंधांप्रती। बळें मारुती हाणित॥६९॥ बाप धनुर्वाडा रघुनंदन । निद्रा न सांडी विंधिता बाण। पांचही पर्वत केले चूर्ण । बळिया संपूर्ण श्रीराम ॥७०॥ श्रीराम मारील बाणेंसीं । हा धाक नाहीं हनुमंतासी । हनुमंत मारील आम्हींसी । हेंही श्रीरामासी भय नाहीं ॥७१॥ छेदोनि पांचही गिरिवरां[6] । बाणपिसाऱ्याचा सुटला वारा । हनुमंत उडविला अंबरा। गरगरां परिभ्रमें ॥७२॥

मारुतीची धावपळ व वायूचा उपदेश : वाहाटुळी माजी भ्रमे तृण । तैसा परिभ्रमें[7] हनुमान जाण। कांहीं न चले आंगवण[8]। जाल्या क्षीण सर्व शक्ती ॥७३॥ वेंगडे वळले पाय हात[9]। पुच्छ घातले पायांआंत । वानरें विचकिले दांत। तंव पिता वायु तेथ पावला॥७४॥ म्हणे सावधान पाहें हनुमंता। तुझिया संग्रामआघाता। निद्रा न मोडोनी श्रीरघुनाथा। वृक्षपर्वतां छेदिलें॥७५॥ त्रैलोक्यराजा श्रीरघुनाथ। याचा नको पाहों पुरुषार्थ। त्रैलोक्याचा करूं शके घात। निमेषार्धांत क्षोभोनी॥७६॥ त्यासी तुवां सर्वस्वें आपण। अनन्यभावों[10] रिघावें शरण। श्रीरामसेवेसीं विकावा प्राण। स्वामी संपूर्ण श्रीराम ॥७७॥

श्रीरामास मारुतीचा साष्टांग प्रणिपात : ऐकोनि पित्या वायूचें वचन। हनुमंत घाली लोटांगण। श्रीरामासीं अनन्य शरण। दास संपूर्ण मी तुझा ॥७८॥ अंतर्यामीं रघुनाथा । जाणसी माझे मनोगता। तुझें स्वामित्व पहावया तत्त्वतां। केला अनुचित संग्राम॥७९॥ ऐसी माझी अपराधता। क्षमा करावी श्रीरघुनाथा । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । शरणागता नुपेक्षीं ॥८०॥

लक्ष्मणाचा संशय : सौमित्र म्हणे रघुनाथा। वीर धीर झुंजार पुरता । सर्वेचि चरणीं ठेवितो माथा। नये सर्वथा विश्वासें॥८१॥ रावणें दावोनि विश्वासासी। जैसें छेदिलें[11] जटायूसीं।

---

शब्दार्थ : १. आपली हकीकत, २. शोधार्थ, ३. धैर्य, ४. स्वभाव, ५. भयंकर, ६. मोठ्या पर्वतांना, ७. भोवू लागला, ८. बळ, ९. हातपाय वळू लागले, १०. एकनिष्ठतेने, ११. मारिले.

तैसेंचि हा करील आम्हांसी। नये वानरासीं विश्वासों ॥८२॥ निधडा प्रतापी तूं रघुवीरा। छेदिले पंच पर्वत तरुवरां। एऱ्हवीं हा आमुचा करिता चुरा। नये वानरा विश्वासों ॥८३॥

श्रीरामांचे लक्ष्मणास आश्वासन व मारुतीचे एक पिंडत्वाचे वृत्तकथन : श्रीराम म्हणे सौमित्रासी। तूं तंव यासी नोळखिसी। एकपिंडत्व यासी आम्हांसीं । हा अति विश्वासी निजसखा ॥८४॥ एकपिंडत्व हनुमंता । तेचि विषयीं पूर्वकथा । तुज सांगेन मी आतां । सावधानता अवधारीं ॥८५॥ मज चित्रकूटीं असतां। तुज भरतासीं युद्ध करितां। म्यां सांगितली होती कथा। ऐक मागुती सांगेन॥८६॥ पुत्रेष्टियागीं यज्ञपुरुषीं । प्रसादताट दिधलें रायासी । त्रिविध भाग करितां त्यासी । तिघी राणियांसी दीधले ॥८७॥ पूर्वशापाचे उद्धरीं । कैकेयीचा भाग नेला घारीं । तेणें ते तळमळी भारी । उरले उरी[1] दोन भाग ॥८८॥ कौसल्या येवोनि कैकेयीपासीं। सुमित्राही निजकृपेसीं । अर्ध विभाग दिधला तिसी । तेणें तियेसी सुख झालें ॥८९॥ ते हे आम्ही चौघे जण । एकपिंडी पैं संपूर्ण। श्रीराम भरत लक्ष्मण। आणि शत्रुघ्न समवेत ॥९०॥ कैकेयीभाग घारी प्राशित । तीस अंजनीजन्म प्राप्त । यज्ञविभाग तिच्या उदरांत। राहिला निश्चित यज्ञपुरुष ॥९१॥ यज्ञपुरुषाचा निजप्राण। तिशीं विचरला संपूर्ण । तेंचि तिसी गर्भधारण। वायुनंदन[2] हनुमंत॥९२॥ विचारितां पैं तरीं। अंजनीभ्रतार केसरी । यज्ञपुरुषप्राणेंकरीं। जन्म धरी हनुमंत॥९३॥ राम लक्ष्मण शत्रुघ्न भरत । अर्धार्धपिंड आम्हा समस्त । सगळ्या पिंडाचा हनुमंत। बळें समर्थ आतुर्वळी ॥९४॥ आम्हांसी आणि हनुमंता। समूळ मूळीं एकात्मता । नाहीं भिन्नत्वाची कथा। जाण तत्वतां सौमित्रा ॥९५॥

हनुमंताला आनंद व सर्वांचे ऐक्य: ऐकताचि श्रीरामवचन। हनुमंतासी आल्हाद पूर्ण। स्वेद[3] रोमांचे[4] आलें रुदन। श्रीरामचरण वंदिलें ॥९६॥ तुटली भिन्नत्वाची गोष्टी। सुटलें मौन पडली मिठी । ऐक्याची पडली गांठी। घडली दाटी क्षेमाची ॥९७॥ गंगा यमुना सरस्वती। तिन्ही मिळोनि एक भागीरथी। श्रीराम लक्ष्मण आणि मारुती। ऐक्यानुवृत्ति चिन्मात्रें ॥९८॥ नाना[5] सरितांचे संभार[6]। मिळणी मिळतां होती समुद्र। तेंवी मारुती आणि सौमित्र। जाले चिन्मात्र श्रीरामें॥९९॥ एका विनवी जनार्दन । तिघां जालें समाधान। स्वामी समर्थ श्रीरघुनंदन। दोघे जण सेवक॥१००॥ गूळ गोडी नांवाची भिन्नता। पाहतां स्वरूप एक एकात्मता। तेंवी लक्ष्मणा हनुमंता। सेवकता श्रीरामीं॥१॥ पिंडभागव्यवस्था। हे शिवरामायणींची कथा । वृथानुवाद[7] न म्हणिजे श्रोतां। पहावें त्या ग्रंथा विचारुनी ॥२॥ ऐकोनि खुणाविलें श्रोतां। वदीनी श्रीराम वदवी कथा। झाडा चुकूं नको आतां। पुढील कथानुवादें ॥३॥ आधींच रम्य रामायण कथा। त्याहीवरी तूं रसाळ वक्ता । भाग्य आलें श्रवणाच्या पंथा। कथा ऐकतां स्वानंद ॥४॥ शतकोटी रामायण। त्या ग्रंथाचें जालें खंडन। त्याचीं जालीं दहा रामायणें। युगभेंद जाण ग्रंथाचें ॥५॥ एकाजनार्दन शरण । जालें हनुमंतदर्शन । विरोधबोधें समाधान । सुख संपूर्ण तिघांसी॥६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां हनुमद्दर्शनं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥ ओव्यां ॥१०६॥ श्लोक ॥१०॥ एवं संख्या॥११६॥

## अध्याय दुसरा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### सुग्रीवाची जन्मकथा

श्रीरामहनुमंतांसी भेटी। दोघां आनंद कोट्यानुकोटी। पुढें हनुमंते केल्या गोष्टी । ते कथाकसवटी अवधारा ॥१॥

शब्दार्थ : १. शिल्लक, २. वायुपुत्र (मारुती), ३. घाम, ४. शहारे, ५. नद्यांचे, ६. समुदाय, ७. व्यर्थ बडबड

दूतोऽहं प्रेषितस्तेन सुग्रीवेण महात्मना । राजा वानरमुख्यानां हनूमान्नाम वानरः ॥१॥
युवाभ्यां स हि धर्मात्मा सुग्रीवः सख्यमिच्छति । तस्य मां सचिवं विद्धि वानरं पवनात्मजम् ॥२॥

हनुमंत सुग्रीवाचा जन्मवृत्तांत विचारतो : हनुमंत सांगे श्रीरामासी। मज सुग्रीवें तुम्हापासीं । धाडिले पहावया वृत्तांतासी। सख्य तुम्हांसीं करावया॥२॥ देवदैत्यदानवांसी। रिघु नव्हे या वनासी । तेथें येतां तुम्हां मानवांसी । वानरांसी विस्मयो ॥३॥ धीर वीर गंभीरता। तुम्हां दोघां देखोनि येतां। भयें आश्चर्य सुग्रीवाच्या चित्ता । निःशंकता देखोनि ॥४॥

सुग्रीवाची शोचीय अवस्था व इच्छा, मारुतीची भूमिका व श्रीरामांचे आश्वासन : हृतदार[१] हृतस्वार्थ[२]। सुग्रीव वाळिभयें भीत। तुमचा इच्छितो साह्यार्त। मज तदर्थ[३] धाडिलें॥५॥ तुम्ही निःशंक निधडे[४] वीर। वाळिभयार्थी साहाकार। तुम्हांसीं करावया मित्राचार । पुसों साचार मी आलों॥६॥ सुग्रीव तूं कोण म्हणसी । वानरस्वामित्व सुग्रीवासीं । माझा विश्वास तयासी । माझें त्यापासीं प्राधान्य[५] ॥७॥ अत्यादरें अतिशयेंसी । माझा विश्वास सुग्रीवासीं। मैत्री वांछितो तुम्हांसी। अभय त्यासी देईं स्वामी॥८॥ मी तंव केवळ तुझें निजबाळक । वानर सैन्येंसी देख। सुग्रीव होऊं पाहे सेवक। कृपा आवश्यक करीं रामा॥९॥

श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामो लक्ष्मणमब्रवीत् । प्रहृष्टवदनः श्रीमान्भ्रातरं पार्श्वतः स्थितम् ॥३॥
सचिवोऽयं कपींद्रस्य सुग्रीवस्य महात्मनः । तमेव कांक्षमाणस्य ममांतिकमिहागतः ॥४॥

ऐकोनि हनुमंताचें वचन। संतोषला श्रीरघुनंदन। कार्यसिद्धीचें लक्षण। सांगे आपण सौमित्रा ॥१०॥ आम्ही ऐक्य वांछूं सुग्रीवासीं । तंव तेणेंचि धाडिलें प्रधानासी । तोही अति आप्त आम्हांसी। अतिशयेंसी जिवलग ॥११॥ येथें आलिया हनुमंता। आम्हांसी शिणणें न लगे आतां। सुलभत्वें प्राप्त होईल सीता। जाण तत्वतां सौमित्रा॥१२॥ श्रीराम म्हणे हनुमंतासी। जें जें तूं कांही सांगसी। तें तें करीन निश्चयेंसी। तुझिया वचनासी नुल्लंघीं ॥१३॥ तुवां सांगितलें मजपासीं । तरी एके बाणें वधीन वाळीसी । सदार[६] राज्य सुग्रीवासी। निमेषार्धेसी मी देईन॥१४॥

श्रीरामांचा प्रश्न व वाली सुग्रीवाचा वृत्तांत : वाळी सुग्रीव हे दोघे जण। कैंचे कोणाचे हे कोण । यांचें समूळ कथन। मज संपूर्ण सांगावें॥१५॥

– श्रीराम उवाच –

यच्छ्रुतं वै ऋक्षराजो वालीसुग्रीवयोः पिता । जननी का तयोरेव न त्वया परिकीर्तिका ॥५॥

श्रीराम म्हणे हनुमंता। वालिसुग्रीवांचा पिता। ऋक्षराज ऐसी ऐकिली कथा। त्यांची माता ते कोण ॥१६॥ वानरांचे सकळ सैन्य। कोणें केलें यांचे अधीन[७] । या दोघांचें समूळ कथन। विवंचून[८] मज सांगें॥१७॥ यांचें कोण पूर्वभवन[९]। यांसी कैसेनि प्राप्त हें स्थान किष्किंधेचें राज्याभिषेचन । देता कोण पैं यांसी ॥१८॥

– हनूमानुवाच –

शृणु राम कथामेतां मया पृष्टः सकौतुकम् । कथयामास धर्मात्मा महर्षिः श्रूयतामिति ॥६॥
सुखमास्ते यदा देवः पद्मयोनिश्चतुर्मुखः। योगमभ्यसतस्तस्य नेत्रेभ्यो यद्रसोऽस्रवत् ॥७॥
तद्गृहीतं भगवता पाणिना चावितुं ततः। निक्षिप्तमात्रं तद्भूमौ ब्रह्मणा लोककर्तृत्वा ॥८॥
तस्मिन्प्रस्त्रवणे राम वानरः संबभूव ह । समाश्वास्य प्रियैर्वाक्यैरुक्तः किल महात्मना ॥९॥

ऋक्षाचा जन्म व बालक्रीडा : हनुमंत म्हणे श्रीरघुनाथा । वालिसुग्रीवजन्मवार्ता । अगस्तिमुखें ऐकिली कथा। ते तुज आतां सांगेन ॥१९॥ ब्रह्मयाच्या नेत्रांमधून जाण । वानराचें जन्मस्थान। तेंही समूळीं कथन । सावधान अवधारीं॥२०॥ ब्रह्मा निजात्मयोगासनीं। बैसला असतां

शब्दार्थ : १. स्त्री हिराहून नेली आहे असा, २. द्रव्य हरण केले आहे असा, ३. त्याकरिता, ४. पराक्रमी, ५. प्रधानपणा, ६. स्त्रीसह, ७. स्वाधीन, ८. विचार करून, ९. पूर्वीचे ठिकाण.

आत्मचिंतनीं। आनंदाश्रु स्रवतां नेत्रींहूनी। करीं धरोनी टाकिले॥२१॥ नेत्रजळ सांडितां धरणीं[1]। वानर जन्मला तत्क्षणीं। ब्रह्मा माता पिता दोन्ही। यालागुनी प्रतिपाळी ॥२२॥ तो ब्रह्मयाचा पढियंता[2]। लडिवाळ आवडता। निजशेजारीं निजविता। प्रतिपाळिता फळें मूळें ॥२३॥ ब्रह्मयाच्या आसनापासीं। नृत्य करीं विनोदेंसीं। नृत्यांगना गोवोनि पुसीं[3]। थाकासरिसीं[4] त्यां पाडी॥२४॥ उडोनि बैसे ऋषिशिरासीं। वांकुल्या दावी सुरवरांसी। तंव तंव आनंद ब्रह्मयासी। वानरेंसीं अति प्रीती॥२५॥ जैसें पोटींचें लडिवाळ[5]। तैसें तयाचें पुरवी कोड। त्याचा विनोद वाटे गोड। कवतुकें चाड तयाची॥२६॥ ऋक्षराज ठेवोनि नांव। ब्रह्मा प्रतिपाळी वैभव। कांहींएक वर्तलें लाघव। अति अपूर्व ऐका स्वामी ॥२७॥

सरोवराला उमेचा शाप : वनीं विचरोनि[6] अहर्निशीं। वानर नित्य ये ब्रह्मयापासीं। यूका[7] काढी दाढीमिशांसी। चहूं मुखांसी चुंबोनीं॥२८॥ तो वानरू एकें दिवशीं। दूरी गेला वनवासासीं। सांडोनियां सत्यलोकासी। गिरिकैलासी परिभ्रमें ॥२९॥ कैलासगिरि-बाह्यप्रदेशीं। उमाशाप[8] बद्ध सरोवरासी। स्नान घडलें तयासी। स्त्रीत्व त्यासी पैं आलें ॥३०॥ निर्मळ जळीं उमावनीं। शिव आणि स्वयें भवानी। नग्न क्रीडा करिती दोनीं। उल्लासोनि स्वानंदें ॥३१॥ तंव तीर्थानिमित्त स्नानासी। तेथें आले सप्तऋषीं। देखोनि उमा लाजली त्यांसी। दोघें जळवासीं गुप्त जालीं ॥३२॥ उमा क्षोभोनि बोलिली वचन। सदाशिव करोनि भिन्न। जो नर येथें करील स्नान। स्त्रीत्व पूर्ण तो पावेल॥३३॥ शाप ऐकतां दारुण। न करितां पैं आचमन। ऋषीश्वर पलायमान। शापबंधन सरोवरा॥३४॥

कस्यचित्त्वथ कालस्य समतीतस्य वानरः। चलत्केसरमात्मानं कृत्वा तस्य तटे स्थितः ॥१०॥
ददर्श तस्मिन्सरसि वक्रच्छायामथात्मनः। कोऽयमस्मिन्मम रिपुर्वर्ततिऽन्तर्जले महान् ॥११॥
तदस्य दुष्टभावस्य करिष्यामि विनिग्रहम्। आत्मानं पातयामास तस्मिन्वानरसत्तमः ॥१२॥
उत्प्लुत्स तस्मात्सरस उत्थितः प्लवगः पुनः। तस्मिन्नेव क्षणे राम स्त्रीत्वं प्राप स वानरः ॥१३॥

शापित सरोवरात उडी मारल्यामुळे ऋक्षाला स्त्रीत्व प्राप्त : तेणें वानरें आपणासी। शृंगारोनि नाना सुमनांसी। येतां सरोवराच्या पासीं। प्रतिरूपासी देखिलें ॥३५॥ वांकुल्या दावितां तयासीं। मारूं धांवतां आवेशी। तेंही येतां भारावयासी। धावे आवेशीं पैं स्वयें ॥३६॥ म्हणे हा मुख्य माझा वैरी। राहिलासे जळाभीतरीं। हाक फोडितो मजवरी। याची बोहरी[9] मी करीन ॥३७॥ निजबळाचिया महाथोरीं। साटोपू धरूनियां शरीरीं। उडोनियां गगनोदरीं। उडी सरोवरीं घातली॥३८॥ क्रोधाचिया क्रोधदृष्टीं। आंवळोनियां वज्र मुष्टी। पुच्छा वळोनियां वेंटी। उठाउठीं उडी घाली॥३९॥ सरोवरी उडी घालितां। वैरी नाढळेचि पैं हाता। सवेग रागें बाहेर येतां। निजपुरुषार्था[10] मुकला॥४०॥ लोपला निजपुरुषत्वाचा भावो। कुचादि योनि स्त्रीअवयवो। स्त्रीकटाक्ष हावभावो। जाला अपूर्व स्त्रीदेही ॥४१॥ अति सुंदर कमनीय[11] कांता। तिसीं कामें भुलला सविता। कामें इंद्र भुलला तिसीं देखतां। स्त्रीकामता संभोग ॥४२॥

युगपत्सा तदा दृष्टा देवाभ्यां सुरसुंदरी। कंदर्पवशगौ तौ तु दृष्ट्वा तां संबभूवतुः ॥१४॥
अमोघरेतः शक्रस्य सुरेशस्य महात्मनः। वालेषु पतितं तेन वाली नाम्ना बभूव सः ॥१५॥
भास्करेणापि तस्यां वै कंदर्पवशवर्तिना। बीजं निषिक्तं ग्रीवायां विधानमनुवर्तिना ॥१६॥
ग्रीवायां पतिते बीजे सुग्रीवः समजायत। एवमुत्पाद्य तौ वीरौ वानरेंद्रौ महाबलौ ॥१७॥

तिला पाहून इंद्र व सूर्याचे कामोद्दीपन व त्यामुळे वीर्यस्खलन: वानर ऋक्षराजासी जाण।

शब्दार्थ : १. पृथ्वीवर, २. आवडता, ३. शेपटामध्ये, ४. तालाबरोबर, ५. लाडके लेकरू, ६. फिरून, ७. उवा, ८. पार्वतीचा शाप, ९. नाश, १०. पुरुषत्वाला, ११. सुंदर.

अंगीं स्त्रीत्व बाणलें संपूर्ण। तरी स्त्रीत्वाची आठवण। सर्वथा आपण स्मरेना ॥४३॥ त्यासी देखोनि अति सुंदर। शक्र सूर्य दोन्ही देवेंद्र। धांविन्नले कामातुर। पळे भयेंकरीं ऋक्षराज ॥४४॥ भयें सांगावया ब्रह्मयाजवळी। वानरी सवेग पळे भूतळीं। शक्र सूर्य कामसमेळीं[१]। अंतराळीं धांविन्नलें ॥४५॥ नव्हतां तिच्या संभोगासीं। स्त्रीकामाच्या अति आवेशीं। वीर्यस्खलन जालें दोघांसी। समकाळेंसीं समवेत ॥४६॥

'वाला' मध्ये इंद्राचे वीर्य पडले म्हणून वाली हे नाव : संस्कृतभाषेमाजी विख्यात। केशां नांव वाल म्हणत। इंद्रवीर्य पडलें तेथ। वालाग्रांत अमोघ[२] ॥४७॥ वानरमस्तकां महाबळी। जन्म पावलासे वालसमेळीं। यालागीं नांव ठेविलें वाळी। आतुर्बळीं वानर ॥४८॥

मानेमध्ये (ग्रीवेवर) वीर्य पडले म्हणून 'सुग्रीव' हे नाव : काय पडिलें मस्तकावरीं। वर तें पाहे जंव वानरी। सूर्यवीर्य कंठावरी। ग्रीवांतरीं[३] पडों सरलें ॥४९॥ ग्रीवेमाजी जन्मसंभव। यालागीं नांवें तो सुग्रीव। दोहीं बंधूंचे जन्मलाघव। अति अपूर्व परिसिलें ॥५०॥

दोघा पुत्रांसह ऋक्ष स्त्रीवेषात ब्रह्मदेवाजवळ जातो : ऋक्षराज स्त्रीवेषेंसीं। सपुत्र आला ब्रह्मयापासीं। देखोनि त्याचिया रूपासी। ब्रह्मा मानसीं विस्मित ॥५१॥ ब्रह्मा म्हणे अति सुंदर। दुष्टकर्मी देव अति दुर्धर। न म्हणती पात्रापात्र[४]। करिती व्यभिचार वेश्येसीं ॥५२॥

ब्रह्मदेवाची शापवाणी : इसी देखोनि अति सुंदर। अमोघवीर्याचा व्यभिचार। जो तो रमेल सुरवर। होईल जोजार पोरांचा ॥५३॥ मजपासोनि जन्म यासी। स्त्रीत्व पावला मूर्खत्वेंसी। शापमुक्त करावयासी। कैलासासी निघाला ॥५४॥

ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून ऋक्षाची शापमुक्तता : ब्रह्मा विनवी पार्वतीसी। शापमुक्त करीं ऋक्षराजासी। येरी पुसोनि सदाशिवासी। केलें वानरासी निर्मुक्त ॥५५॥ सांडोनि भ्रमभुंजगभार। जेंवी सर्प रूपें होय दोर। तेवीं सांडोनि स्त्रीआकार। जाला वानर ऋक्षराज ॥५६॥ स्वप्नीं ब्राह्मण होता अंत्यज[५]। जागा होतां म्हणे मी द्विज। तेंवी सांडोनि स्त्रीत्वपुंज[६]। जाला ऋक्षराज वानर ॥५७॥ अगाध संतांची संगती। सवेग वानरा शापमुक्ती। सुखी झाला प्रजापती। सुखात्मस्थिति ऋक्षराजा ॥५८॥ आतुर्बळी[७] वानरमूर्ती। देखोनियां पुत्रसंतती। शक्र सूर्य सुखावती। संतुष्टती निजपुत्रां ॥५९॥

दत्वा तु कांचनीं मालां वानरेंद्रस्य वालिनः। अक्षयां गुणसंपूर्णां शक्रस्तु त्रिदिवं गतः ॥१८॥
सूर्योऽपि स्वसुतस्यास्य निरूप्य पवनात्मजम्। कृतेषु व्यवसायेषु जगाम सवितांबरम् ॥१९॥

वालीला पाहून इंद्राला आनंद व त्याला माला अर्पण : देखोनि वाळीच्या निजबळा। इंद्रासी पुत्रसुखाचा सोहळा[८]। कंठीं निजकनकाची माळा। घातली गळां वाळीचिया ॥६०॥ हे माळा कंठीं असतां। कृतांतासीं युद्ध करितां। श्रम नव्हे त्या वर्षे शत झुंजतां। निराहारता[९] निरुदकीं ॥६१॥

मालेचा प्रभाव व दुंदभीचा वध : दुंदभीपाठीं लागतां बळी। निराहारी निरुदकीं युद्धकाळीं। कांहीं श्रमी नव्हेचि वाळी। तैं हे जवळी माळा होती ॥६२॥ हे माळा असतां कंठेंसीं। युद्ध करितां महाबळियासीं। कदा अपजयो नव्हे त्यासी। वरदमाळेसीं सदा विजयी ॥६३॥ वाळी सुग्रीव समानबळी। माळाबळें अधिक वाळी। युद्ध करितां रणकल्लोळीं। सुग्रीवासीं तळीं साद आणी ॥६४॥ स्वयें युद्ध करितां देख। माळा शत्रूसीं अति अतर्क्य। जो जो युद्धा ये सन्मुख। तो तो विमुख होय वरदमाळे ॥६५॥

मालेची निर्मिती : कैंची माळा इंद्रासीं। वधूं जातां वृत्रासुरासी। कश्यपें दिधली सामर्थ्येंसी।

शब्दार्थ : १. कामातुर होऊन, २. व्यर्थ न जाणारे, ३. मानेमध्ये, ४. योग्यायोग्य, ५. महार, ६. स्त्रीस्वरूप, ७. पराक्रमी ८. आनंद, ९. आहारावाचून असताही.

निजविजयार्थासी[1] सुरेंद्रा ॥६६॥ कश्यपसामर्थ्याची माळा । इंद्रें घातली वाळीच्या गळां । तेणें त्यासी प्रताप आगळा । कळिकाळा नावरे ॥६७॥

सूर्याने केलेली सुग्रीव व मारुतीची संगती : इंद्रें देवोनि माळेसी । सामर्थ्य दिधलें वाळीसी । तैसेंचि सूर्यें सुग्रीवासी । हनुमंतासी निरविलें ॥६८॥ हनुमंताच्या सामर्थ्यासी । प्रतीति आहे स्वयें सूर्यासी । बाळपणीं आला गिळावयासी । स्वयें राहूसी पळवूनी ॥६९॥ ऐसें जाणूनि हनुमंतासी । सूर्यें निरविलें[2] सुग्रीवासीं । तुझेनि कीर्ति होईल यासी। श्रीरामासीं सख्यत्वें ॥७०॥ हनुमंत होईल श्रीरामभक्त। सुग्रीव त्याचेनि सनाथ । ऐसा जाणोनि भविष्यार्थ। सुग्रीवा निरवीत हनुमंता ॥७१॥

दोन पुत्रांसह उपभोगासाठी ऋक्षाला राजधानी दिली : निजमाळा देवोनि वाळीसी। इंद्र गेला निजधामासी। सुग्रीवा निरवोनि हनुमंतासी। सूर्य गगनासी पैं गेला॥७२॥ शक्र सूर्य गेले दोन्हीं । ऋक्षराजा पुत्र दोन्हीं । स्वयें ब्रह्मयानें आश्वासोनी । राजधानी त्यां देत ॥७३॥

दृष्ट्वार्क्षराजं स्वं पुत्रं ब्रह्मा लोकपितामहः । सांत्वयित्वा ततः पश्चाद्देवदूतं समादिशत् ॥२०॥
गच्छ मद्वचनाद्दूत किष्किंधां नाम वै शुभाम् । विश्वकर्मकृतां दिव्यामतियोग्यां च शोभनाम् ॥२१॥
अभिषिंचय राजानमारोप्य महदासने । दृष्टमात्राश्च ते सर्वे वानराणां चमूपतिः ॥२२॥
ऋक्षराजस्यं साह्यार्थं भविष्यति वशानुगः ॥२३॥

विश्वकर्म्याकडून किष्किंधानगरीची निर्मिती : ऋक्षराजासी पिता माता। स्वयें स्वयमेव विधाता । गेलें पुरुषत्व आणिलें हाता । आश्वासिता होये ब्रह्मा ॥७४॥ विश्वकर्मा पाचारूनि। किष्किंधा करवी राजधानी । नाना वृक्ष फळें शोभनी । नाना रत्नीं रत्नाढ्य ॥७५॥ दुर्ग दुर्गम रचिले वेगीं। दैत्यदानवां न लभे मागी। अतर्क्य तेथींचि रिगीनिगी[3]। पुत्रप्रयोगीं करविलें ॥७६॥ मरीच्यादि ब्रह्मदूत । सवे देऊनि समस्त । ऋक्षराजाच्या अभिषेकार्थ। किष्किंधेआंत ते आले ॥७७॥ ब्रह्मयाची आज्ञा अति समर्थ । देशोदेशींचे वानर समस्त। सेनापति आले तेथ । अभिषेकार्थ ऋक्षराजा ॥७८॥ मुकुटकुंडले रत्नमेखळा। बाहुअंगदें रत्नमाळा । वानरा बाणली राजकळा । सपुत्र सोहळा राज्याचा ॥७९॥

ऋक्षास राज्याभिषेक व वालीला युवराजपदाची प्राप्ती : किष्किंधा मुख्य राजधानी। तेथें श्रेष्ठ वरासनीं । ऋक्षराज अभिषेकुनी । वानरसैन्यीं निजराजा ॥८०॥ अभिषेकिती ऋषीश्वर। वानर करिती जयजयकार । सुमनें[4] वर्षतीं सुरवर । ब्रह्मा साचार तुष्टला ॥८१॥ ऋक्षराज महाबळी । यौवराज्यीं अभिषेकिला वाळी । सेनापति महाबळी। केला ते काळीं सुग्रीव ॥८२॥ ऐसा तो ऋक्षराज समर्थ । दोहीं पुत्रांसमवेत । किष्किंधाराज्य जालें प्राप्त । भाग्य समर्थ स्त्रष्ट्ययानें[5] ॥८३॥ जें कां अकिंचन[6] वानर। तेही केले राज्यधर। त्यांसी वंदिती सुरवर। पितृभाग्यें थोर सभाग्य ॥८४॥ त्रैलोकींचे वानर । वालिसुग्रीवांचे आज्ञाधर। पिता ऋक्षराज सधर[7] । सेनासंभार असंख्य ॥८५॥

ऋक्षाच्या निधनानंतर वाली राजा होतो व सुग्रीव युवराज व नल सेनापती : तो ऋक्षराज राजा जाण । काळगति पावला मरण। दोंघी पुत्रीं करूनि दहन । उत्तर विधान तिहीं केलें ॥८६॥ मिळोनि समस्त प्रधान । वाळीसी केलें अभिषेचन। कनिष्ठ सुग्रीवासी जाण । दिधलें संपूर्ण यौवराज्य ॥८७॥ वाळीनें पाहोनि बळ आणि नीती । धर्मयोद्धा आणि व्रती । तो नीळ केला सेनापती । गंभीरस्थिति दळभारीं ॥८८॥ वालिसुग्रीवांचा पिता । ऋक्षराजा नव्हे रघुनाथा। ह्या दोन्हींची एकमाता । दोहींचा पिता तो भिन्न भिन्न ॥८९॥ एक शक्रसुत येक सूर्यसुत । जगीं विख्यात हे मात। ह्या दोहींचा निजवृत्तांत । समूळ साद्यंत सांगीतला

शब्दार्थ : १. मोठा जय प्राप्त व्हावा म्हणून, २. स्वाधीन केले, ३. आत व बाहेर येणे, ४. फुले, ५. ब्रह्मदेवाचेमुळे, ६. दरिद्री. ७. बलवान.

॥९०॥ ऐसें सांगोनियां कथन। हनुमंत घाली लोटांगण। सुग्रीवेंसी सख्य संपूर्ण। करावें कृपेनें श्रीरामा ॥९१॥ केवळ वनींचे वनचर । हे तंव नव्हती पालेखाईर । ब्रह्मकुळींचें कुळेश्वर । वीर दुर्धर नरयोध्ये ॥९२॥ समूळ यांची जुनाट कथा। ऐकोनि सुख जालें रघुनाथा। आलिंगिलें हनुमंता। उल्हासता स्वानंदें ॥९३॥ एकाजनार्दना शरण । वालिसुग्रीवजन्म कथन । समूळ जालें निरूपण । रामायण अतिगोड ॥९४॥ इति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां वालिसुग्रीवजन्मकथनं नाम द्वितीयः प्रसंगः ॥२॥ श्लोक ॥२३॥ ओंव्या ॥९४॥ एवं संख्या ॥११७॥

## अध्याय तिसरा

॥ ॐ नमः श्री सच्चिदानंदाय नमः ॥

### सुग्रीवाशी सख्य

सुग्रीवाला स्नेहसंबंध जोडण्यासाठी श्रीराम पाचारण करितात : वालिसुग्रीवजन्मकथा । ऐकोनि सुख श्रीरघुनाथा । संतोषोनियां हनुमंता । होये बोलता श्रीराम ॥१॥ सख्य करावें सुग्रीवासीं। हे मुख्य कर्तव्य आम्हांसी । तूंही सख्यार्थ आलासी । अतिशयेंसी सुख जालें ॥२॥ कबंधें सांगीतलें मजपासीं। हृतदारदुःख[1] सुग्रीवासी। सुखी करावया तयासी। ऋष्यमूकासी मी आलों ॥३॥ जो मज होय अनन्य शरण । त्याचें दुःख निर्दाळून। सुखी करावें संपूर्ण। ब्रीदं[2] जाण हें माझें ॥४॥ दुःख निरसूनि सुख द्यावयासी। मी आलों वनवासासी। वेगीं बोलावी सुग्रीवासी। सुखी त्यासी मी करीन ॥५॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन। हनुमंत जाला सुखसंपन्न। वंदोनि श्रीरामाचे चरण । केलें उड्डाण उल्हासें ॥६॥

ऋष्यमूकात्स हनुमान्गवा मलयपर्वतम् । आचचक्षे तदा वीरः सुग्रीवाय महात्मने ॥१॥
अयं रामो महाप्राज्ञः संप्राप्तो दृढविक्रमः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा संख्यार्थं त्वामुपागतः ॥२॥

हनुमंत सुग्रीवाला श्रीरामांचा वृत्तांत सांगतो : हनुमंते करोनि उड्डाण । सुग्रीवापासीं आला आपण । म्हणे तूं भाग्यें सभाग्य पूर्ण । श्रीरघुनंदन तुष्टला ॥७॥ राम लक्ष्मण महावीर। निःशंक निधडे धनुर्धर । तुजसीं करावया मित्राचार[3]। आले साचार ऋष्यमूका ॥८॥ कोठील कोणाचे हे कोण । येथें यावया काय कारण । समूळ शोधिले म्यां जाण। सावधान अवधारीं ॥९॥ श्रीराम दाशरथी महावीर । बंधु लक्ष्मण धनुर्धर। श्रीरामकांता सीता सुंदर। वनीं विहार पित्राज्ञा ॥१०॥ पित्याचे मानोनि आज्ञेसी । दंडकारण्य वनवासीं । तेंही रहावें चौदा वर्षी । फळमूळांसीं सेवोनि ॥११॥ शून्याश्रमीं[4] पंचवटीं । रावणें हरिली सीता गोरटी। तिची शुद्धि करावयासाठीं । आले जगजेठी ऋष्यमूका ॥१२॥ श्रीरामें उद्धरिलें कबंधासी । शापविमुक्त केलें त्यासी । तेणें सांगितलें श्रीरामापासी। सुग्रीवासीं सुखी करीं॥१३॥ सीताहरणदुःख श्रीरामासी। दारहरणदुःख सुग्रीवासी । समान दुःख तुम्हां दोघांसी । येरयेरांसी[5] सुखी करा ॥१४॥ निःशेष वदूनि वाळीसी । सदार[6] राज्य सुग्रीवासी। देवोनि सुखी करावयासी । किष्किंधेसी राम आला॥१५॥ सांडोनि सीताशुद्ध्यर्थ। साधावया तुझा कार्यार्थ। कृपेनें आला श्रीरघुनाथ । भाग्यवंता सुग्रीवा ॥१६॥ श्रीराम प्रेमवत्सलू । श्रीराम निरपेक्ष स्नेहाळू । श्रीराम निरपेक्ष स्नेहाळू । श्रीराम भक्तकाजकृपाळू । दीनदयाळू श्रीराम ॥१७॥

श्रुत्वा हनूमतो वाक्यं सुग्रीवो हृष्टमानसः । दर्शनीयतमो भूत्वा प्रीत्योवाच च राघवम् ॥३॥

शब्दार्थ : १. स्त्रीहरण केल्याचे दुःख, २. बाणा, ३. सख्य, मैत्री, ४. आश्रमात कोणी नसताना, ५. परस्परांस, ६. स्त्रीसहित

सुग्रीवाला आनंद व त्याचें श्रीरामांकडे गमन : ऐकोनि हनुमंताची गोष्टी । सुग्रीवासी आनंदकोटी । हनुमंताची पाठी थापटी । प्रेमें संतुष्टीं आलिंगीं ॥१८॥ मेघगर्जनें मयूर नाचे। तैसा सुग्रीव हर्षें सांचें । संपूर्ण भाग्य हनुमंताचें । कोणें वाचे मी वानूं ॥१९॥ माझा साधितां निजस्वार्थ। जाला श्रीरामाचा आप्त। श्रीरामभाग्यें हा समर्थ । कृतकृत्यार्थ मी झालों ॥२०॥ सुमनमाळा[1] सुकलियावरी । स्वयें सांडिजे जेंवी दुरी । तेंवी श्रीरामभय होतें भारीं । तें माळेच्या परी त्यागिलें ॥२१॥ घ्यावया श्रीरामाची भेटी । सुग्रीव निर्भय जाला पोटीं । श्रीराम लक्षोनियां दृष्टी । उठाउठीं आले दोघे ॥२२॥ धरोनि हनुमंताचा हात । जेथें होता श्रीरघुनाथ । सुग्रीव तेथें आला त्वरित । शरणागत मी तुझा ॥२३ ॥

श्रीरामांजवळ सुग्रीवाची शरणागती : तूं सत्यप्रतिज्ञ रघुवीर । माझा करावा अंगीकार। मी तुझा निजकिंकर । शरण साचार श्रीरामा ॥२४॥

एवं तद्वचनं श्रुत्वा सुग्रीवस्य सुभाषितम् । संप्रहृष्टमना हस्तं पीडयामास पाणिना ॥४॥
ततो रामस्य सुग्रीवः पाणिं जग्राह पाणिना । हृष्टः सौहृदमालंब्य पर्यष्वजत पीडितम् ॥५॥

ऐसें सुग्रीवसंभाषित[2]। ऐकोनियां श्रीरघुनाथ । होवोनियां आनंदभरित। जाला उदित खेवेंसी[3]॥२५॥ सुग्रीव घाली लोटांगण। श्रीरामें उचलिला हातीं धरून। वानरें करोनि हस्तग्रहण। दिधलें आलिंगन हृदयेंसीं॥२६॥ हृदया हृदय लागलें। तंव हृदयस्थ[4] एक जाले। सहज सुहृदत्व घडलें । आलिंगिलें एकमेकां ॥२७॥

श्रीरामांनी आलिंगन देऊन स्वागत केले : श्रीरामहृदयस्थ चिद्घन। त्यासी देता आलिंगन। सुग्रीवहृदया समाधान । वाळिभवभान निमाले॥२८॥ नरा वानरा पडली मिठी । आधिव्याधि शमली पोटीं । सांगणें पुसणें सरल्या गोष्टीं । आनंदकोटी सुग्रीवा ॥२९॥ दोघां सख्य जालें अलौकिक । अग्निसूर्यप्रमाण[5] साक्ष । कांहीं करणें न लगे देख । दोन्हींचें एक हृदय जालें ॥३०॥ दोहींचें हृदय जालें एक। तेंचि निजसख्याचे सख्य। आण प्रमाण देतां भाक । तो लौकिक अति अल्प ॥३१॥ श्रीरामसख्यापुढें जाण। बहिर्भूत आणप्रमाण । भाक तेथें केवळ तृण । सखा संपूर्ण श्रीराम ॥३२॥ श्रीरामसख्याची थोरी । अति अगाध चराचरीं । तें सख्य पावोनि वानरीं । जयजयकारी गर्जती ॥३३॥

सुग्रीवो राघवश्चैव वयस्यत्वमुपागतौ । प्रहृष्टमनसौ प्रीतौ तावुभौ हरिराघवौ ॥६॥
अन्योन्यमभिवीक्षंतौ न तृप्तिमुपजग्मतुः । त्वं वयस्योऽसि हृद्यो मे एकं दुःखं सुखं न चौ ॥७॥

श्रीराम स्वयें नरपती । सुग्रीव स्वयें वानरपती। दोघां सख्यत्वाची स्थिती। अनन्य प्रीतीं आल्हाद॥३४॥ जैसी प्रीति सुवाससुमनां । जैसी प्रीति जीवा मना। तैसी प्रीति सुग्रीवरघुनंदना। अन्योन्य जाणा अति प्रीति॥३५॥ जैसी प्रीति गूळगोडीसीं । जैसी दीपकप्रकाशीं । नाना रसा आणि उदकासीं । रामा सुग्रीवासी अति प्रीति ॥३६॥ सुग्रीवें पाहतां श्रीरामचंद्रा । श्रीरामें पाहतां वानरेंद्रा। प्रीतीं पाहतां येरयेरां । दोहींच्या नेत्रां नव्हे तृप्ती॥३७॥ जैसी प्रीति चकोरचंद्रां। तैसी प्रीति सुग्रीवरामचंद्रां। जैसी प्रीतीं जळा जळचरां। तैसी वानरां श्रीरामीं ॥३८॥ ऐसी श्रीरामा वानरां प्रीती । श्रीरामीं वानरां अनन्य भक्ती । ऐशिया ऐशिया प्रेमप्रीतीं। पाहतां तृप्ति नव्हे नेत्रीं ॥३९॥ श्रीराम सुग्रीव मारुती। तिघां झाली अनन्य प्रीती । मग बैसोनि सुखसंमतीं । अनुवादती[6] निजगुज ॥४०॥

रावणाने सीतेला पळवून नेल्याचे श्रीराम सुग्रीवाला सांगतात: सुग्रीव म्हणे श्रीरघुपती । तुम्ही आले जीचेनी अर्थीं । ते म्यां देखिली सीता सती। गगनगतीं[7] पै नेतां ॥४१॥

ह्रियमाणा मया दृष्टा रक्षसा क्रूरकर्मणा । क्रोशंती राम रामेति लक्ष्मणेति च विस्वरम् ॥८॥

शब्दार्थ : १. फुलांचा हार, २. सुग्रीवाचे भाषण, ३. आलिंगन देण्याला, ४. आत्मे, ५. अग्नी आणि सूर्य यांच्या साक्षीने. ६. सांगू लागले, ७. आकाशमार्गाने.

आत्मना पंचमं मां हि दृष्ट्वा शैलतले स्थितम् । उत्तरीयं तदा त्यक्तं शुभान्याभरणानि च ॥९॥

रावणाचे खांदेवरी । वेगें नेतां गगानांतरीं । आम्हीं देखिली वानरीं । श्रीराम गजरीं आक्रंदें ॥४२॥ श्रीरामराया धांव धांव । राघवा तूं सवेग पाव । घेवोनि लक्ष्मणाचें नांव । दीर्घ स्वरें आक्रंदें ॥४३॥ रामनाम सीतारव। वानरीं ऐकिला पैं सर्व। आणिक जालें जी लाघव । तें अति अपूर्व ऐकें स्वामी ॥४४॥

सीतेने खाली टाकलेले अलंकार: येचि पर्वतशिखरीं । आम्हीं असतां पंचवानरीं। उत्तरीयवास[१] सीतासुंदरी । सालंकारीं[२] त्यागिलें ॥४५॥ लक्षोनियां हनुमंता । वस्त्र अळंकार सांडी सीता। तें आलें हनुमंताच्या हाता। सभाग्यता म्हणोनियां ॥४६॥ श्रीरामनामाचें उत्तरीयवस्त्र। रामनामांकित अलंकार । आम्हां दाखविले समग्र । राखे निरंतर मारुती ॥४७॥ रामनामीं ज्या विश्वास। असे भाग्य सभाग्य ज्यांस। तेचि पावती श्रीरामवास। भाग्यें बहुवस हनुमंत ॥४८॥

सीतेचे आक्रंदन व मारुतीचे उड्डाण : रामनामे दीर्घस्वर। सीता आक्रंदे सुंदर।आम्हीं ऐकतां समग्र । हनुमान वीर खवळला ॥४९॥ मारोनि राक्षस दुर्धर । करोनि दीनांचा उद्धार। सोडवावया सीता सुंदर । हनुमान सत्वर उसळला ॥५०॥ रागें आपटोनि पुसाटी[३]। वटारोनि आरक्त दृष्टी । वळोनियां वज्रमुष्टी। उठाउठीं उडाला ॥५१॥

रावणाचे लंकेत उड्डाण : हनुमंताचे निजउड्डाण । गेलें ग्रहचक्र टाकोन । तळीं तेणें धाके रावण। गेला लंघोन सागरु ॥५२॥ गेला देखोनि लंकानाथ। हनुमंत क्रोध करी शांत । ऐसा ऐकोनि वृत्तांत। अति विस्मित श्रीराम ॥५३॥

ते अलंकार पाहून श्रीरामांना परम दु:ख : ऐकोनि वानरांच्या गोष्टी । विस्मयौ सौमित्राच्या पोटीं । सीतालंकार पहावया दृष्टीं । उठाउठीं आणविले ॥५४॥

उत्तरीयं गृहीत्वा तु स तान्याभरणानि च । इदं पश्चेति रामाय दर्शयामास वानरः ॥१०॥

ततो गृहीत्वा वासस्तु शुभान्याभरणानि च । हा प्रियेति रुदन्धैर्यमुत्सृज्य न्यपतद्भुवि ॥११॥

सीतालंकारवस्त्रांसी। हनुमंते दाखविलें श्रीरामासी । तेणें धरोनि हृदयासीं। उकसाबुकसी स्फुंदत ॥५५॥ सीते मजसीं कां रुसलीसी । पूर्व प्रीति कां विसरलीसी। रागें मजसीं कां न बोलसी । कोठें गेलीसी प्रिय कांते ॥५६॥ सीतेचे देखोनि अळंकार । श्रीराम करी विलाप थोर । मूर्च्छित पडे सत्वर। विसंज्ञ[४] अति विव्हळ ॥५७॥

सुग्रीवाकडून श्रीरामांचे सांत्वन, सीता शोधाचे आश्वासन व प्रतिज्ञा : श्रीरामाची ऐकोनि व्यथा। सुग्रीवासी परमावस्था। सावध करोनि श्रीरघुनाथा । होय बोलता पुरुषार्था ॥५८॥ स्वामी तुज मज सख्य जालें असतां । तुझी निवारवेना व्यथा । तरी लागली लाज मित्रार्था। आणीन सीता शोधोनी ॥५९॥ कळिकाळाची मर्दिती मान। ऐसे माझे चौघे प्रधान । अमित मेळवीन वानरांचे सैन्य । सीता शोधोन आणीन ॥६०॥ स्वर्ग मृत्यु पाताळीं । नेंली असतां जनकबाळी। घेवोनियां जगधांडोळी[५] । सीता वेल्हाळी आणीन ॥६१॥ श्रीरामा वाहतों तुझी आण। सीता आणीन मी शुद्धि करोन । पुढतीं शिवतों तुझे चरण। परम प्रमाण हें माझे ॥६२॥ रुदन करूं नको श्रीरामा । ऐक माझी प्रमाणसीमा । अध:पतन जाण मज प्लवंगमा[६] । श्रीरामा सीता जरी मी नाणीं ॥६३॥ सीताशुद्धि सांडोनि श्रीरामा । जरी गुंतेन आणिके कामा। तरी वानर अधमजन्मा। श्रीरामा सीता जरी नाणीं ॥६४॥ सांडोनि सीताशुद्धीच्या क्रमा। जरी मी लागेन आणिके कामा । तरी धिक्कार माझिया जन्मा । श्रीरामा सीता जरी नाणीं ॥६५॥ सीतावियोगविभ्रमा । दु:ख न करीं श्रीरघूत्तमा । निमेषे

---

शब्दार्थ : १. अंगावरील वस्त्र, २. अलंकारांसह, ३. शेपूट, ४. निश्चेष्ट, ५. जगांतला शोध, ६. वानराला.

आणीन श्रीरामरमा[1] । प्रतापगरिमा[2] पाहें माझी ॥६६॥ लाजविला पितामह[3] ब्रह्मा । लाजविला पूर्वजमहिमा । लाजविलें क्षात्रधर्मा । श्रीरामा सीता जरी नाणीं ॥६७॥

**श्रीरामांची घोर प्रतिज्ञा :** ऐकोनि सुग्रीवाचे वचन । हास्य करी श्रीरघुनंदन । तुज राज्य दारा दिधल्यावीण । सीतास्मरण मज नाहीं ॥६८॥ मित्रकार्यापुढें जाण । सीताशुद्धि मज तृणासमान । वाहतों दशरथाची आण । सत्य जाण सुग्रीवा ॥६९॥ जें तूं बोलिलासी निर्वाण । तें मज मानलें प्रमाण । तुझें कार्य न होता पूर्ण । सीताआगमन मज निंद्य ॥७०॥ वैश्वदेव बळिविधान। न करितां भोजन निंद्य जाण। तेंवी तुझें कार्य करितां पूर्ण। सीताआगमन मज निंद्य ॥७१॥ न करितां औपासन । स्वदारगमन वेश्येसमान । तेंवी तुझें कार्य न होतां पूर्ण । सीताआगमन मज निंद्य ॥७२॥ अतिथि दवडोनियां निराशन। जेंवी निंद्य होय निजभोजन । तेंवी तुझें कार्य न होतां पूर्ण । सीताआगमन मज निंद्य ॥७३॥ न करितां संध्यास्नान । यज्ञादि कर्मे निंद्य जाण । तेंवी तुझें कार्य न होतां पूर्ण । सीताआगमन मज निंद्य ॥७४॥ जरी तुवां येथें आणिली सीता । तुजें कृतकार्य न होतां । तिसी मी न पाहें सर्वथा। मज आण दशरथाची ॥७५॥ सीतेचें आधीं कोठें गमन । शुद्धि केल्या मग आगमन। वाळिवधालागीं जाण । हें व्यत्वधान तंव नाहीं ॥७६॥ आधीं साधीन मित्रकार्यार्था । मग शोधोनि आणीन सीता । धनुष्यबाण घेवोनि हाता । वाळिवधार्था निघाला ॥७७॥

अद्यैव तं हनिष्यामि तव भार्यापहारिणम् । इमे हि मे महाभाग पत्रिणस्तिग्मतेजसः ॥१२॥
वालिसंज्ञममित्रं ते भ्रातरं कृतकिल्बिषम् । शरैर्विनिहतं पश्य विकीर्णमिव पर्वतम् ॥१३॥

सुग्रीवा ऐक सावधान । जेणें केलें तुझें दारहरण। त्या वाळीचा घेईन प्राण । तीक्ष्ण बाण सोडोनी ॥७८॥ माझे बाण अति तिखट। मंत्रोनि मारीन सदट । तेणें वाळीचा छेदोन कंठ । करीन सपाट बाण एकें ॥७९॥ वज्रें हाणीतला पर्वत । जैसा विखुरें पृथ्वीआंत। तैसा वाळी वधीन येथ । रुधिरोक्षत देखसी ॥८०॥

**वालीचा पराक्रम व सुग्रीवाचे वर्णन :** क्षोभला देखोनि श्रीरघुनाथा । सुग्रीवें चरणीं ठेविला माथा । वाळीचिया अति पुरुषार्था । सावधानता अवधारीं ॥८१॥ अरुणोदयापूर्वी जाण । अविश्रमें[4] श्रमेंवीण। सप्तसमुद्री करी स्नान । अर्ध क्षण न लागतां ॥८२॥ वाळी सव्यहस्तें पर्वत । सवेग टाकी गगनाआंत । वामहस्तें स्वयें झेलित । शतानुशत गिरिवर ॥८३॥

**दुंदुभी दैत्याचा वध :** महिषासुराचा ज्येष्ठ सुत। दुंदुभी नाम महिष अति विख्यात । युद्धालागीं परम उदित । विचरत तिहीं लोकीं ॥८४॥ दुंदुभी जावोनि पाताळासीं । युद्ध मागे वरुणापासीं । तेणें धाडिलें हेमाद्रीपासीं[5]। जाय त्यासीं युद्ध करीं॥८५॥ दुंदुभी येवोनि युद्धार्थ । हेमाद्रीतें पाचारित । तो म्हणे मी यदर्थ[6] अशक्त । जाय युद्धार्थ तूं यमापासीं ॥८६॥ दुंदुभी पाचारी यमासी । यम विचारी मानसीं। वाळिहस्तें मृत्यु यासी । तेणें त्यापासीं धाडिलें॥८७॥

दुंदभे युद्धदानाय नाहं प्रतिबलस्तव । युद्धं समबलेनैव कर्तव्यं च जयैषिणा ॥१४॥
किष्किंधां गच्छ रे तत्र वालिनामा हरीश्वरः। स युद्धतृष्णामाधूर्य मदं ते नाशयिष्यति ॥१५॥

यम म्हणे दुंदुभीसी। मज युद्ध न करवे तुजसीं । तूं युद्ध करीं वाळीसीं । तो समबळेंसीं बळिष्ठ ॥८८॥ वानर वाळी महाबळी । सबळ योद्धा आतुर्बळी । पाहता ये भूमंडळी । रणरवंदळी[7] करील ॥८९॥ वाळी युद्धतृष्णातृषित । तूंही युद्धासी अति उद्यत[8]। वाळीपासी जावोनि त्वरित। युद्ध पुरुषार्थ करीं त्यांसी।॥९०॥ तू म्हणसीं वाळी कोण । किष्किंधेचा

शब्दार्थ : १. श्रीरामाची स्त्री, (सीता). २. प्रतापाचा मोठेपणा, ३. आजोबा, ४. विश्रांती घेतल्याशिवाय, ५. मेरुपर्वताजवळ, ६. याविषयी, ७. युद्धात नाश, ८. तयार.

राजा जाण। त्यासीं करावें युद्ध दारुण । आंगवण[1] पाहों तुझी ॥९१॥ ऐसें ऐकातां वचन । दुंदुभी सवेग आला जाण । ठाकोनि पावला किष्किंधाभुवन । करी गर्जन युद्धार्थ ॥९२॥ येथें कोण सबळ वाळी । तेणें बाहेर निघावें याचिकाळीं । युद्धा यावें मजजवळी । रणरांगोळी मी करीन ॥९३॥ ऐकोनि दुंदुभियुद्धवादन । वाळी करोनि उड्डाण । सन्मुख आला पैं आपण। रागें गर्जोन भुभुःकारें ॥९४॥ ऐकातां भुभुःकार आरोळी। दुंदुभीची बैसली कानटाळी। म्हणे वानर हा महाबळी । केवी आकळीं संग्रामीं॥९५॥ वाळीसी हाणितां मुष्टिघात - दुंदुभीचा उखळला हात । तेणें धाकें पळे वनांत। अति गुप्त निजमावा ॥९६॥ प्रवेशतां निजबिळीं। थापें हाणितला तया वेळीं । अशुद्ध[2] वमूनी भूतळीं । प्राण तत्काळीं सांडिला ॥९७॥

कायं कैलाससंकाशमेतदस्ति प्रकाशते । उद्धर्तुमिको वाली वा शक्तोऽहं रघुसत्तम ॥१६॥
सर्वप्राणभृतां लोके तृतीयं नोपलक्षये । ईदृशो विक्रमो यस्य जवे चानुत्तमा गतिः ॥१७॥

दुंदुभीचा अतिप्रचंड देह : त्या दुंदुभीचे कलेवर । कैलासप्राय महाथोर। श्रीरामा पाहें पां साचार । अति दुर्धर सुरनरा ॥९८॥ तें उचलावया कलेवर । स्वयें शक्त वाळी वीर । दुसरा सुग्रीव वानर । तिसरा शूर असेना ॥९९॥ दुंदुभिदेहउद्धारार्थीं । धांडोळितां त्रिजगती । तिसरियाची न चले शक्ती । हे उचलिती दोघे बंधू ॥१००॥

रावणाची दुर्दशा : तिजा जो उचली अंगभारें । त्याचेनि हस्तें वाळी मरे। भाकिलें मातंगऋषीश्वरे । निजनिर्धारें श्रीरामा ॥१॥ ऐसा वाळी बळी विख्यात । आणिक त्याचा पुरुषार्थ। तुज मी सांगेन इत्थंभूत। ऐक निश्चित श्रीरामा ॥२॥ वाळी करितां अनुष्ठान। त्यासी धरूं आला रावण। वीस भुजा पसरोन। बळें करून कवळूं गेला ॥३॥ तंव येरें पसरोनियां वामहस्त । विसां भुजासमवेत । आकळोनि लंकानाथ। काखेंआंत चेपिला ॥४॥ विक्षेप जाला अनुष्ठाना । वाळी सवेग उठिला स्नाना । काखे असोनि दशानना । तत्क्षणीं निघाला ॥५॥ रावण असोनि काखेतळीं । सप्तसागरीं करी आंघोळी। नाकीं तोंडीं भरे जळीं । तेणे तळमळीं रावण ॥६॥ काखेहूनि निसटावयासी । सामर्थ्य नव्हे रावणासी। कळ लागली दाही शिसीं । कासाविस लंकानाथ ॥७॥ काखे सूदला रावण । हें वाळी गेला विसरोन। घरा आला स्नान करून । अति विंदान तेथें जालें ॥८॥ आवडीं अंगद उचलिला वाळीं । तंव रावण पडिला भूतळीं । देखतां वानरीं सकळीं । भूतावळीं मिळाली ॥९॥

रावणाला खेळणे म्हणून अंगदाच्या पाळण्यावर बांधला : दहा मुकुट मुखें शिरीं । तयासी धरोनि वानरी। अंगदाच्या पाळण्यावरी । खेळण्यावरी बांधिलें॥११०॥ अंगदाचे धारोष्ण मूत । रिचवे रावणाच्या मुखाआंत । मुखावरी हाणी लात । मुलें चिमटीत सर्वांगें ॥११॥

पौलस्तीची याचना, त्यामुळे रावणाची मुक्तता : निर्गम[3] नाहीं रावणासी । पौलस्ति येवोनि वाळीपासीं । भिक्षा मागोनि घेतले लंकेशासी । वानरीं त्यासीं विनोद केला ॥१२॥

कश्यपमाळेमुळे वाली अजिंक्य : एक मसी[4] लाविती मुकासी । एकीं हिरतिलें मुकुटासी । काळें तोंड मोकळे केंसीं। रावण लंकेसी धाडिला॥१३॥ ऐशा वाळीचिया पुरुषार्था। विचारोनिया श्रीरघुनाथा । विक्रमें करवेल घाता। तरी त्या कार्यार्था अंगीकारीं ॥१४॥ वाळी सुग्रीव आम्ही समबळी[5] । कश्यपमाळा वाळीजवळी । तेणें त्यासी ख्याती आगळी। युद्धकाळीं मज जिंके ॥१५॥ कश्यपमाळा वरद देख । युद्धीं जो जो सन्मुख । तो अवश्य होईल विमुख । आपण विजयी निजवरदें ॥१६॥

शब्दार्थ : १. पराक्रम, बल, २. रक्त, ३. सुटका, ४. काजळ, ५. समानशक्तीचे.

कश्यपाच्या मानासाठी वालीला लपून मारणे : श्रीराम स्वयें विचारी देख । वाळीस होऊं नये सन्मुख । आपण राहोनि विमुख । वाळी अवश्य वधावा ॥११७॥ कश्यपाचिया वरदार्था। अवतार न करवे अन्यथा । वाळीस वधावें विमुखता । मित्रकार्यार्थी साधावें ॥११८॥

श्रीरामांचे आश्वासन, सुग्रीवाला आनंद : सुग्रीव बोलिला जें आपण । सप्तताड विषम जाण । एकें बाणें करीं छेदन । वालिर्निदळण[1] त्याचेनि ॥११९॥ वाळी सुग्रीव महावीरां। यांहोनि वेगळा जो आपण तिसरा । उचलील दुंदभीच्या कलेवरा । वाळिवानरा तो वधील ॥१२०॥ ऐसें बोलतां सुग्रीवासी । श्रीरामें आश्वासिलें त्यासी । दाखवी दुंदुभिकलेवरासी । आणि सप्ततालांसी छेदावया ॥२१॥ दुंदुभिकलेवर मज तृण । वामांगुष्ठें उचलीन जाण । सप्ततालांचे छेदन। करीन संपूर्ण बाणें एकें ॥२२॥ ऐसें बोलतांचि जाण। श्रीरामें धनुष्या वाहोनि[2] गुण[3] । म्हणे मज दावीं तालवन । सीतीं बाळ लावोनी ॥२३॥ करावया वाळीचा घात। श्रीरामें धनुष्या घातला हात। सुग्रीव आनंदें नाचत । कृपा श्रीरघुनाथ तुष्टला ॥२४॥ एकाजनार्दना शरण । सुग्रीवाशीं सख्य जालें पूर्ण । पुढे वाळीचें निर्दळण । स्वयें श्रीरघुनंदन करील॥१२५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सुग्रीवसख्यनिरूपणं नाम तृतीयोऽध्याय: ॥३॥ ओंव्या॥१२५॥ श्लोक ॥१७॥ एवं ॥१४२॥

## अध्याय चौथा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### वाली सुग्रीवाच्या वैराची मूळ कथा

दोघा बंधूच्या कलहाच्या कारणासंबंधी श्रीरामांचा प्रश्न : निर्दळोनियां वाळीसी । सदार राज्य सुग्रीवासी। द्यावया श्रीराम उल्लासी। मित्रकार्यासी अवंचक ॥१॥ स्वकार्य सांडोनियां मागें। मित्र-मित्रकार्यार्थ लगवेगें। श्रीरघुनाथ धांवें अंगें । साह्य सर्वस्वें शरणागता ॥२॥ श्रीराम विचार करी शुद्ध । हे तंव दोघे सखे बंधु । कां पडला द्वेषसंबंधु । द्वेषसंबंधु पुसत ॥३॥

किंनिमित्तं महद्वैरं श्रोतुमिच्छामि तत्वतः । अनंतरं वधिष्यामि संप्रधार्य बलाबलम् ॥१॥

तुम्ही दोघे बंधु सहोदर[4]। तुम्हां दोघांत कां पडिलें वैर । तेंही अतिशयेंसी दुर्धर । येरयेरां घातक ॥४॥

सुग्रीवाकडून निवेदन : या वैराचें मूळ कारण । समूळ सांगावें संपूर्ण। ऐकोनिया श्रीरामभाषण । सांगे आपण सुग्रीव ॥५॥

लोभाचा प्रभाव : पितापुत्रां सख्य सहोदरां । वैरासी मूळ द्रव्य दारा । सुहृद पेटती वैराकारा । द्रव्यदारदेहलोभें ॥६॥ द्रव्य दारा या लोभापासीं । अहंकार सदा मुसमुसी । तो वैर पाडी सहृदांसी । आह्मां दोघांसी वैर लोभें ॥७॥ कैसा लोभ वैर कवण । त्याही वैराचें निजकारण । समूळ सांगेन लक्षण । सावधान अवधारीं ॥८॥

श्रूयतां राम तेनाहं राज्यात्स्वादवरोपितः । परुषाणि संश्राव्य निर्धूतोऽस्मि बलीयसा ॥२॥

पिताजींच्या निधनानंतर बंधूंचे सख्य : आमच्या वैराची थोरी । श्रीरामा सावध अवधारीं । स्त्रीराज्यलोभाचारीं । वाळीनें बाहेरीं घातलें मज ॥९॥ पिता राज्यीं असतां जाण । वाळीस यौवराज्य संपूर्ण । मज दिधलें सैन्याधिपतिपण । समसमान एकात्मता ॥१०॥ पिता निमालियावरी[5] जाण । समस्त मिळोनि प्रधान । ज्येष्ठा वाळीस राज्यासन। यौवराज्य पूर्ण

शब्दार्थ : १. वाळीचा नाश, २. चढवून, ३. दोरी, ४. सखखे, ५. वारल्यावर.

मज दिधलें ॥११॥ शांत दांत सुबुद्धि प्रबळ । सेना राखों जाणे अविकळ[1]। तो सेनानी[2] केला नीळ । सबळ दळ त्याचेनि ॥१२॥ दोघे बंधू एकात्मता । येरयेरां अवंचकता[3]। उदक पिणें नाहीं तत्वतां । भोगभिन्नता मग कैंची॥१३॥ एकत्र आसन शयन। दोघा एकत्र भोजन। येरयेरांलागीं वेंचिती प्राण । दोघां संपूर्ण एकात्मता ॥१४॥ ऐसे दोघे एकात्मता। अविकल्प राज्य करितां। पुढें आली विक्षेपता[4]। तेही श्रीरघुनाथा अवधारीं ॥१५॥

मायावी नाम तेजस्वी पूर्वजो दुंदुभेः सुतः । तेन तस्य महद्वैरं वालिनः स्वीकृतं पुरा ॥३॥
स तु सुप्ते जने रात्रौ किष्किन्धाद्वारमागतः । नर्दति स्म सुसंरब्धो वालिनं चाह्वणे ॥४॥

दुंदुभीचा पुत्र मयासुर याचें युद्धास आव्हान : दुदुंभीचा ज्येष्ठ कुमर। मयनामा महासुर। पितृवैरें वैराकार। वाळी वानर वधूं इच्छी ॥१६॥ विभांडूनियां किष्किंधा गड। वाळी मारीन हे मानसीं होड[5]। घेईन दुंदुभीचा सूड । गर्वारूढ होवोनि आला ॥१७॥ किष्किंधेच्या महाद्वारीं । मय आला मध्यरात्रीं । गर्जत घर्घरस्वरीं । गिरिदरी दुमदुमिल्या ॥१८॥ ऐकोनि त्याचा गिरागज। भयभीत झाले सबळ वानर । अवघे कांपती थरथर। राहावया धीर न धरवे ॥१९॥ वानरांचा राजा वाळी । येथें कोण आहे महाबळी । मजसीं युद्ध करावया रणफळीं । वीरश्रीनें येथें यावें ॥२०॥

वाली व मी बाहेर आलो : असुरासीं युद्धा निघतां वाळी । बंधुस्नेहाच्या कळवळीं । मीही आलों ते काळीं । बंधूजवळी साह्यार्थ ॥२१॥ दुंदुभि मारिला माझा पिता । त्याचा सूड मी घेईन आतां । ऐसें वाळीनें ऐकतां । सकोपता चालिला ॥२२॥ वाळीनें देतांचि आरोळी । दुंदुभिपुत्राची बैसली टाळी । आम्हां दोघां देखतां बळीं । धाकें तत्काळीं पळाला ॥२३॥

मयासुर पळून गुहेत गेला : मी एकला हे दोघे जण । घायें माझा घेतील प्राण । येणें भयें तो आपण । पलायमान भयभीत ॥२४॥ वाळी म्हणे यासी न मारितां । नगरा न वेचें मी रिता। त्याच्या करावया जीवघाता। पाठी लागतां सोडीना ॥२५॥ किष्किंधा सांडोनि दुरी । मय पळे गिरिकंदरीं । येवोनियां निजविवरीं । बिलद्वारीं प्रवेशला ॥२६॥

स तृणैरावृतं दुर्गं धरण्यां विवरं महत् । प्रविवेशासुरो वेगादावामासाद्य विष्ठितौ ॥५॥
मामुवाच तदा वाली वचनं क्षुभितेंद्रियः । इह त्वं तिष्ठ सुग्रीव बिलद्वारि समाहितः ॥६॥
यावदत्र प्रविश्याहं निहन्मि समरे रिपुम् । स्थापयित्वा तु मां तत्र प्रविवेश बिलं ततः ॥७॥

सुग्रीवाला दारावरच राहण्यास सांगून वाली स्वतः गेला : अतर्क्य बिळ तें सर्वांसी । असुर त्या बिळीं बिळवासी। आम्हीं अंधारीं लक्षोनि त्यासीं । बिळापासीं दोघे आलों ॥२७॥ अंधाराचे निजनेटी । दैत्य रिघे बिळ संकटीं । आम्ही त्याची न सोडूं पाठी । बिळानिकटीं आलों दोघे ॥२८॥ वाळी मजला आज्ञा करी । सावध राहें बिलद्वारीं । मी रिघेन बिळाभीतरी । जंव यें वैरी मारोनीं ॥२९॥ मी म्हणें सवें येईन साह्यासी । वाळी म्हणे त्या मयकासी । मारावया काय साह्य येसी । बैस द्वारासीं सावधान ॥३०॥ बिळीं प्रवेशतां वाळी । दुंदुभिसुतें नेला पाताळीं । तेथें दानव कोट्यनुकोटी बळी । युद्धरवंदळीं मांडिली॥३१॥ युद्ध देखोनि दारुण । वाळी जाला सावधान । वरद विजयमाला पूर्ण । पाहे आपण ते काळीं ॥३२॥

अथ वाली सुसंक्रुद्धो मालां गुह्य च कांचनीम् । पूर्वदत्तां महेंद्रेण या युद्धाय प्रतिश्रुता ॥८॥

कश्यपविजयवरदमाळा। इंद्रें दिधली कृपानुमेळां। वाळी सांभाळोनि गळां। मग परदळीं मिसळला ॥३३॥ कंठीं माळा आल्या देख । अवश्य वैरी होती विमुख । युद्धा आलिया सन्मुख । रणीं निःशेष निमावे ॥३४॥ निराहारीं निरुदकीं । युद्ध करितां वर्षें अनेकीं । बाधो न शके तहान भुकीं । श्रमबाधा नव्हे वरदें ॥३५॥ वरदमाळा असतां जवळी। वाली

शब्दार्थ : १. बिनचूक, २. सेनापती, ३. न फसविणे, ४. अडथळा, विघ्न, ५. प्रतिज्ञा.

वानर आतुर्बळी। मर्दोनि दानवांची फळी। रणकल्लोळीं गर्जत ॥३६॥ सप्रधान ससैन्य सकुमर । दानव मारिले अपार । मुख्य धुरा थोर थोर । वाहती पूर रुधिराचे ॥३७॥ दानव मारिले अमित । उरले ते पळाले समस्त । दुंदुभिपुत्र येवोनि तेथ । युद्ध करी वाळीसीं ॥३८॥ निरुदक निराहारेंसी । अविश्रम रण एकवीसमासीं । त्याचेनि हातें मृत्यु पावसी । मयासुरासी शिववरद ॥३९॥ वाळी मारावया निभ्रांत । वरदबळें युद्ध करित । वाळी निजमाळें समर्थ। श्रमरहित रणयोद्धा ॥४०॥ पंधरा मास रण दुर्धर । मयासुरासीं सुटलें रुधिर । अशुद्धें पूर्ण जालें विवर । बाहेरी पूरप्रवाह ॥४१॥

तस्य प्रविष्टस्य बिलं साग्रः संवत्सरो गतः । स्थितस्य मे बिलद्वारि स कालो व्यत्यवर्तत ॥९॥
नर्दतामसुराणां च ध्वनिर्मे श्रोत्रमागतः । निरस्तय च संग्रामे क्रोशतोऽपि स्वनो महान् ॥१०॥
अथ दीर्घस्य कालस्य बिलद्वाराद्विनिःसृतम् । सफेनं रुधिरं दृष्ट्वा ततोऽहं भृशदुःखितः ॥११॥

पंधरा महिने मी बाहेरच वाट पहात बसलो : मी बैसलों बिलद्वारीं। काय वर्तलें भीतरीं । तें मी नेणेंचि बाहेरी । सवा वर्षवरी तिष्ठलों ॥४२॥

नंतर आतून आरोळ्या ऐकू आल्या व रक्ताचा प्रवाह आला : तंव वीरांचा रणक्रोध । भीमावेशें गर्जत शब्द । नोकूनपणाचें सुबद्ध । अति विरुद्ध ऐकिलें ॥४३॥ राहें साहें वीर शूर । पळों नको धरीं धीर। घाय वाजती निष्ठुर। घायें वीर हुंबती ॥४४॥ एक रडत एक पडत। एक कण्हत एक कुंथत। ऐसे वीर विकळित। म्यां हें समस्त ऐकिलें ॥४५॥ ऐसे शब्द जंव ऐकत। तंव बिळाआंतून रक्त। निघालें अति प्रवाहित। सफेन उतत बिलद्वारीं ॥४६॥ बिलद्वारीं देखोनि रक्त । वाळी मारिला युद्धांत । तेणें मी जालों दुःखाभिभूत। पडिलों मूर्च्छित आक्रंदें ॥४७॥

वाली ठार झाला असावा असे वाटून त्याच्या सूडासाठी निघणार होतो : वाळीऐसे बंधुनिधान। रणीं पडिलें आक्रंदोन। त्याचा सूड घ्यावया जाण । बिळीं आपण रिघो पाहें ॥४८॥ पाहोनि निजभुजांची वास । दृढ घालोनियां कास । बिळीं करितांचि प्रवेश । ऋषि लोमश मज वारी ॥४९॥

तोच लोमशऋषींनी येऊन नगरीवर गंधर्वानी आक्रमण केल्याचे सांगितले: किष्किंधा राहिली बहु दुरी । दुंदुभिपुत्र बिलप्रदेशांतरी । आम्ही दोघे गुंतलो विवरीं । राजा नगरीं कोणी नाहीं ॥५०॥ ऐसें जाणोनि किष्किंधापुर । राज्य घ्यावया सत्वर । वेगीं आले विद्याधर । तिहीं नगर वेढिलें ॥५१॥ हाहाभूत देखोनि नगरी। मजपासीं प्रधान चारी। आले अति त्वरेंकरी। रिघतां विवरीं तिहीं वारिलें ॥५२॥

त्या गुहेतून राक्षस बाहेर येऊ नयेत म्हणून मी शिळेने तोंड बंद केले : विवरीं वाळीचा जाला अंत । तुझाही येथें करील घात । हातींचे राज्य जाईल व्यर्थ । ऐसा अनर्थ नको करूं॥ ५३॥ वाळी मारिला निश्चित । सफेन रुधिर वाहे येथ । तुवां रिघों नये तेथ । ऋषी समस्त वारिती ॥५४॥ वैरी निर्दाळोनि समस्त । नगर राखोनि पैं स्वस्थ । मग वाळी बंधूच्या शुद्ध्यर्थ। रिघों विवरांत समस्तही ॥५५॥

अहं त्ववगतो बुद्ध्या चिन्हैस्तैर्भ्रातरं हतम् । दुःखार्तश्चोदकं दत्वा किष्किंधामागतस्ततः ॥१२॥
गूहमानस्य मे तत्वं यत्नतो मंत्रिभिः श्रुतम् । समेतैर्मुनिभिः सर्वैस्ततोऽहमभिषेचितः ॥१३॥

वालीला अखेर तिलांजलीही दिली : बिलद्वारीं वाहतां रक्त । असुरीं वाळी मारिला तेथ। म्यांही मानोनि निश्चित । अति दुःखावर्तें ऊठिलों॥५६॥ स्नान करोनियां जळीं। बंधु उद्धारावया वाळी । म्यां दिधली तिळांजळी । मंत्रमेळीं ऋषिउक्त ॥५७॥

नंतर किष्किंधेला येऊन आक्रमक शत्रूंचा पाडाव केला : ऐकोनि निजपुराचा बाध । स्त्रीबाळकां

अति निर्बंध । तेणें मज आला क्रोध । नगररोध छेदावया ॥५८॥ नगर वेढिलें विद्याधरीं । असुर आलिया विवरद्वारीं । युद्ध करितां दोहींपरी । संकट भारी मांडेल ॥५९॥ ऐसें सांगतां ऋषीश्वरीं । म्यां उचलोनि प्रचंड गिरी। दृढ ठेविला विवरद्वारीं । वैरी बाहेरी न निघावया ॥६०॥ मग करोनि उड्डाण । किष्किंधेसी येवोनि जाण। केलें विद्याधरांचें कंदन । चौघे प्रधान न येतांचि ॥६१॥ माझ्या उड्डानाच्यानि वेगें । प्रधान राहिले पैं मागें । म्यां येवोनि लागवेगें । वैरी निजांगें निर्दाळिले ॥६२॥ माझें ऐकता गर्जन । वीरीं उभ्यां सांडिले प्राण। अवघे झाले कंपायमान । जीव घेवोन पळाले ॥६३॥ स्त्रिया बाळें केलीं निर्मुक्त। नगर सुखी करोनि समस्त। माझा देखोनि पुरुषार्थ। संतोषत ऋषिवर्य ॥६४॥ येवोनि जंव पाहती प्रधान । तंव म्यां केलें अरिमर्दन । तेणें हर्षे चौघे जण । संतोषोन सुखी जाले ॥६५॥

राज्यं प्रशासतस्तस्य न्यायतो मम राघव । आगजाम रिपुं हत्वा वाली तमसुरोत्तमम् ॥१४॥

वालीचा वध झाला असे समजून सुग्रीवाला राज्याभिषेकही झाला : माझा पुरुषार्थ देखोन । चौघे प्रधान ऋषी सज्ञान। किष्किंधेचें राज्य संपूर्ण । अभिषेचन मज केलें ॥६६॥ पूर्ण षणमासपर्यंत । प्रजा सुखी केली समस्त । राज्य करोनि धर्मयुक्त। तंव शक्रसुत वाळी आला ॥६७॥

नंतर मयासुराला ठार करून वाली किष्किंधेत हजर झाला : मर्दोनियां मयासुर । त्यांचे घेवोनियां शिर । उघडोनियां विवरद्वार । केला भुभुःकार वाळीनें ॥६८॥ ऐकोनि वाळीचें गर्जन । मज उल्लास झाला पूर्ण । जेंवी प्रेताचा परते प्राण । तेंवी आगमन वाळीचें ॥६९॥ मृता होय अमृतपान । अंधा उघडती लोचन । अवर्षणीं वर्षे घन । तेंवी आगमन वाळीचें ॥७०॥ पतिव्रतें प्रियदर्शन । साधक पावे ब्रह्मज्ञान । तेंवी वाळीचें आगमन । सुखसंपन्न मज सुग्रीवा ॥७१॥ ऐकोनि वाळीचें आगमन । सुखी जाले ऋषी प्रधान । सुखी नगर नागरिक जन । सुखसंपन्न स्त्रिया बाळें ॥७२॥ उभवोनियां गुडिया मखरें । ढोल निशाण वाद्यगजरें । अवघे आले पैं सामोरे । जयजयकारें गर्जती ॥७३॥ म्यां सुग्रीवें येवोनि आपण । दीर्घ घालोनि लोटांगण । मस्तकीं वंदोनियां चरण । आलिंगन देऊं गेलों ॥७४॥ मज देखोनि सन्मुख । वाळी रागें जाला विमुख । माझें न पाहेचि मुख । परम दुःख मानसीं ॥७५॥

अभिषिक्तं तुं मां दृष्ट्वा क्रोधसंरक्तलोचनः। मदीयान्मंत्रिणो दृष्ट्वा परुषं वाक्यमुक्तवान् ॥१५॥

सर्वांना संतोष व माझ्यावर वालीचा क्रोध : मज केलें राज्याभिषिञ्चन। तेणें वाळी क्रोधायमान । अभिषेक करवित जे प्रधान । त्यांतेंही आपण निग्रहूं पाहे ॥७६॥ मग हात जोडोनि म्यां पुढतीं । वाळीप्रती केली विनती । माझा अपराध कोणे अर्थी । त्वां कां चित्तीं कोप धरिला ॥७७॥ आम्ही तुजवीण अनाथ । तूं तंव आमचा ज्येष्ठ भ्रात । तुझेनि आम्ही सदा सनाथ। आम्ही कृतार्थ तुझेनि ॥७८॥ भाग्यें जिंतोनि शत्रूसि । सभाग्य भाग्यें येथें आलासी । परम भाग्यें भेटलासी । ऐसें वाळीसी विनविलें ॥७९॥

माझ्यावरील आरोप : ऐकोनियां माझें वचन । वाळी क्रोधें आरक्तनयन । कठिण बोलिला दारुण । सुहृदपण सांडोनी ॥८०॥ तूं बंधु नव्हेस माजा वैरी । वैर केलें बहुता परी । तुझ्या वैराची पैं थोरी । परोपरी छळवादी ॥८१॥ मी रिघालों विवरांत । त्वां द्वारीं रहावें सावचित्त। तेथें तुवां केलें विपरीत । द्वारीं पर्वत स्थापिला ॥८२॥ सुग्रीवा तुझें मनोगत । अदुरीं माझा करावा घात । स्वयें भोगावें राज्य समस्त । बिळ तदर्थ बूजिलें ॥८३॥ बिळीं रिघावे मज शुद्ध्यर्थ । तें त्वां सांडोनियां समस्त। तुम्ही धरिला राज्यभोगस्वार्थ। सुहृदत्व तुजलागीं कैंचें ॥८४॥ स्वयें राज्य भोगावें समस्त । म्यां मरावें हें तुझ्या पोटांत । बिल बुजिलें तदर्थ । कपटें व्यर्थ विनविसी ॥८५॥ म्यां रिघोनि बिळांत । दानव मारिले समस्त । सपुत्र सैन्या

करितां घात । रक्त विवरीं प्रवाहे ॥८६॥ वीरीं करितां महामारी । अशुद्ध उलथलें विवरीं । तो प्रवाहो बिलद्वारीं। दानवां बोहरी पैं करितां ॥८७॥ वरद मायावी असुरांसी । निराहारी निरुदकासीं । युद्ध करितां एकवीस मासीं । मयावीरासी तैं अंत ॥८८॥

सूदयित्वा तु तं शत्रुं मायाविनमहं तदा । निष्कामन्नैव पश्यामि बिलस्य पिहितं मुखम् ॥१६॥
मम विक्रोशतश्चैव सुग्रीवेति पुनः पुनः । यदा प्रतिवचो नास्ति तदाहं भृशदुःखितः ॥१७॥

गुहेच्या तोंडावर शिळा ठेवल्याबद्दल राग : मारोनियां मयासुरासी । आणि मज बाहेरी यावयासी । मार्ग न दिसे कासाविसी । तुवां बिळेंसीं बूजिलें ॥८९॥ भोंवता भोंवें विवरांत । मार्ग मज नोहे प्राप्त । गुप्त दानव करिती घात । अंधारांत अति धाकें ॥९०॥ मग विचार केला मानसीं । सुग्रीव आहे दारापासीं । आपण बोलावितां त्यासी । येवोनि वेगेंसीं काढील ॥९१॥

सुग्रीव मेला असें समजून वालीचा शोक : सुग्रीव सुग्रीव स्वयें बोलतां । पुनः पुनः हाका देतां । प्रतिवचन नायकतां। दुःखावस्था मज जाली ॥९२॥ एकला द्वारीं बैसला होता । दानवीं ठकोनि केलें घाता। तो कळिकाळातें नाटोंपता । छळतां छळतां मारिला ॥९३॥ सुग्रीव मारिला तत्वतां । बंधुस्नेहें परम व्यथा । रडत रडत चडफडितां । दुःखावस्था मज जाली ॥९४॥ आम्हां दोघां सख्यसंबंधु । अणुमात्र नाहीं विरोधु । सुग्रीव अंतरला बंधु । दुःखसिंधु मज जाला ॥९५॥ केउता गेलासि रे सुग्रीवा । तूं तंव माझा निजविसांवा । दैत्य मारोनि आलों दे खेवा । बंधुगौरवा विसरलासी ॥९६॥ उल्लंघोनि मम आज्ञेसी । सुग्रीव नवचे लघुशंकेसी । दानवीं निर्दाळिलें त्यासी । उकसाबुकसीं स्फुंदत ॥९७॥ सुग्रीव वानर युवराजा । जीव प्राण आत्मा माझा । दैत्यीं मारिला युद्धी समजा । कोणे काजा मी उरलों ॥९८॥ जरी मजसवें आला असता। तरी सुग्रीव माझा वांचता । विवरद्वारीं म्यां ठेवितां । स्वयें बंधुघाता म्यां केलें ॥९९॥ तुझा बाहेर केला घात । मज कोंडिलें विवरांत । माझा करावया उद्धरणार्थ। येई धांवत बंधुराया ॥१००॥ आम्ही तुम्ही वेगळे नव्हो कधीं। मज कां आठवली कुबुद्धी । तुज ठेवोनि द्वार विंधीं । मी कां युद्धीं रिघालों ॥१॥ मज लागला बहुत काळ । मजवीण न घेसी जळफळ । तेणें तुज भरोनि तरळ । प्राण तत्काळ सांडिला ॥२॥ ऐसा सुग्रीवालागीं विलपत। अंधारीं भोंवों विवरांत। दाटिला विवरद्वारीं पर्वत। देखिलें तेथ रविच्छिद्र ॥३॥

उपलेनास्मिसंरुद्धो राज्यं मृगयतात्मनः । सुग्रीवेण नृशंसेन विस्मृत्य भ्रातृसौहृदम् ॥१८॥
एवमुक्त्वा तु मां तत्र वासरैकेन वानरः । तदा निर्वासयामास वाली विगतसाध्वसः ॥१९॥

वालीचा सुग्रीवावर दोषारोप : सुग्रीवाचे निजहृद्गत। मज कोंडोनि मारावें विवरांता। बिलद्वारीं घातला पर्वत। राज्य समस्त भोगावया॥४॥ पर्वत असतां बिलद्वारीं । रवि देखिला छिद्रांतरीं। घायें पर्वत करूनि दुरी । बिळाबाहेरी मी आलों ॥५॥ सुग्रीव बैसविलासे एथ । त्याचा काय झाला वृत्तांत। ऐसें जंव मी विचारित। तंव विपरित देखिलें ॥६॥ सुग्रीवें किष्किंधेचा राजा । होवोनि भोगी माझ्या भाजा । शत्रुत्व जोडिलें ओजा । वैरी माजा हा एक ॥७॥ सुग्रीवालागीं मी तळमळित । सुग्रीव माझाचि करी घात । ऐसें केलें पैं विपरीत । राज्यभोगार्थ सुग्रीव॥८॥ विवरीं माझी सांडोनि शुद्धि । सांडोनियां सुहृदबुद्धी । सुग्रीव बैसला राज्यपदीं । दुष्ट दुर्बुद्धि दुरात्मा ॥९॥

वालीची पत्नी तारा ही वस्तुस्थिती सांगून सुग्रीव निर्दोषी आहे असे आवर्जून सांगते : तारा सांगे वाळीपासीं । बुडतां किष्किंधेच्या राज्यासी । सुग्रीवें राखिलें प्रतापेंसी । सत्य तुम्हांपांसी सांगतें ॥११०॥ बिळीं गुंतलेती दोघे वीर । मागें शून्य राज्य नगर। तें राज्य घ्यावया सत्वर।

वेढिलें पुर विद्याधरीं ॥११॥ विरोधोनि नगरनागरां । निरोधिलें स्त्रियां कुमरां । आक्रांत देखोनि समग्रा । ऋषीश्वरां परम चिंता ॥१२॥ सेनापति वानरसैन्य । त्यांसी सर्वथा नाहीं ज्ञान । पूर्वीचे चौघे प्रधान। आले धांवोन तुम्हांपांसी ॥१३॥ तुम्हा दोघां जणा आणावयार्थ। विवरा आले ऋषी समस्त । तंव विवरीं रुधिर देखिलें वाहत। सुग्रीव रडत देखिला ॥१४॥ रुधिर देखोनि सफेन । सुग्रीव स्वयें कांस घालून । अवघ्यांस द्वारीं बैसवून । शुद्धीलागोनी निघाला ॥१५॥ सुग्रीव ऋषीपासीं सांगत । वाळी मारिला प्रवाहे रक्त । मीही जातों त्याचे शुद्ध्यर्थ । मंत्री हो समस्त पुरी राखा ॥१६॥ ऐसेपरी सांगोनि ऋषि समस्तां । सुग्रीव बिळीं प्रवेशतां । ऋषीश्वरीं धरिला त्वरिता । पूर्ववृत्तांता अवधारीं॥१७॥ तुम्हांसि शोधावयालागोनी । प्रधान गेले तनोपवनीं। शून्य देखोनि राजधानी। आले धांवोनि गंधर्व ॥१८॥ तिहीं निरोधिलें नगर । आक्रंदती स्त्रिया कुमर । राज्य गेलें गेलें समग्र । ऋषी सत्वर सांगों आले ॥१९॥ वाळी निमाला रुधिरप्रवाहें । मेलियामागें मरों नये । ब्रह्मदत्त स्वराज्य आहे । तें आधीं संरक्षीं ॥१२०॥ स्वराज्य राखोनियां स्वस्थ । मग निघावें वालिशुद्ध्यर्थ । तोंवरी बिलद्वारीं घालीं पर्वत । ऋषि सांगत पूर्वसूचने ॥२१॥ युद्ध करितां विद्याधरीं । विवरद्वारें येतील वैरी। संकट पडेल दोहींपरी । घाली बिलद्वारीं पर्वत ॥२२॥ ऋषींचीं आज्ञा अति समर्थ । सुग्रीवें मानोनि निश्चित । घालोनि बिलद्वारीं पर्वत । आला युद्धार्थ महावीर ॥२३॥ सुग्रीव वीर धीर जुंझार। विभांडोनियां विद्याधर । विजयी जाला एकांगवीर । जयजयकार ऋषी करिंती॥२४॥ शून्या असों नये राजधानी। विचारोनि ऋषिप्रधानीं। सुग्रीवातें राहवूनी। अभिषिंचोनी बैसविला ॥२५॥ स्वयें सुग्रीव राज्य न घेता । बलात्कारें बैसविलें माथां । यासीं कोपों नको आतां । क्षमा सर्वथा करा स्वामी ॥२६॥

तारेचे सांगणे न ऐकता सुग्रीवाच्या घाताला प्रवृत्त होतो : ऐकोनियां तारेचें वचन। वाळी बोले कोपायमान । यांचें तुज न कळे विंदान । वैरी संपूर्ण हा माझा॥२७॥ विभांडूनि वैरियासी। राज्यीं बैसविलें आपणासीं। माझा आठवू का नव्हे यासी। पूर्ण द्वेषी हा माझा॥२८॥ माजा सांडोनि परामर्ष । सुखें राज्य करी षणमास । माझे मरणीं यासी हर्ष। म्हणोनी विवरास बुजविलें ॥२९॥ राज्य राखोनि स्वस्थता । बिळींचा पर्वत जरी काढिता । तरी मानितों अतिसख्यता । वैरी सर्वथा हा माझा ॥१३०॥ ऐसें बोलोनि सक्रोधता । करितां सुग्रीवाच्या घाता। तारेनें धांवोनि धरिलें हाता । स्वबंधुघाता करूं नये ॥३१॥

तारेची मध्यस्थी व सुग्रीवाचा राजधानीचा त्याग व प्रयाण : सुषेणाची निजदुहिता । तारा वाळीची पतिव्रता। रुमा सुग्रीवाची कांता । हिरोन घेता होय वाळी ॥३२॥ तारेचेनि बोलें जाण। राखिला सुग्रीवाचा प्राण। हिरोन दारा वस्त्र भूषण। नगरनिर्याण निवस्त्र केलें ॥३३॥ लावोनियां पैं लंगोटीं। सुग्रीव दवडिला गिरिकपाटी। सक्रोध प्रधानां पाहतां दृष्टीं । तेही उठाउठीं पळाले॥३४॥ प्रधानीं त्यासी केले अभिषिंचन। कोपें दंडूं पाहे जाण। तेणें भयें पलायमान। आले पळोन मजपासीं ॥३५॥ सख्या बंधूं दोघां आम्हां । विरोध पडावयाची सीमा । सांगीतली श्रीरामा । उभय धर्मा यथार्थ ॥३६॥

सुग्रीवाचे ते वृत्त ऐकून श्रीरामास अनुकंपा : हृतयौवराज्य हृतयुवदारा। तेणें अति दुःखी मी श्रीरघुवीरा । अहोरात्र न लागे निद्रा । श्रीरामचंद्रा तुझी आण ॥३७॥ ऐसें सुग्रीवें सांगतां। कृपा आली श्रीरघुनाथा। वाळी वधीन मी आतां। ठेविला माथां पद्महस्त॥३८॥ वालिसुग्रीवां विरोध। त्याचा जाला अनुवाद । एकाजनार्दनीं परम बोध। वालिवध निजमो ॥१३९॥ स्वस्ति श्रीभावार्थ रामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां वालिसुग्रीवविरोधकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ ओंव्या ॥१३९॥ श्लोक ॥१९॥ एवं ॥१५८॥

# अध्याय पाचवा

॥ श्रीराम समर्थ ॥

## वालीकडून सुग्रीवाचा पराभव

वालीच्या सामर्थ्याने सुग्रीवाला भीती : पुढती वाळीच्या संत्रासीं । सुग्रीव सांगे श्रीरामापासीं। हतराज्य गुप्त वनवासी । तेथेंही आम्हांसी मारूं धांवे ॥१॥

तेनाहमपविद्धश्च हतदारश्च राघव । तद्भयाश्च महीं कृत्स्नां विचरामि समंततः ॥१॥

ऋष्यमूकं गिरिवरं भार्याहरणदुःखितः । प्रविष्टोऽस्मि दुराधर्ष वालिनः कारणान्तरे ॥२॥

आम्हीं जावें जेथ जेथ । वाळी मागें धावें तेथ तेथ । आमचा करावया जीवघात । वैर पोटांत दृढ धरिलें ॥२॥ वालिभयें भयभीत। अहोरात्र असों गुप्त । पाळती येवोनियां तेथ । शुद्धि सांगत वाळीसी ॥३॥

त्यामुळे सुग्रीव ऋष्यमूक पर्वताचा आश्रय घेतो : भयें भोंवतां दशदिशीं । नारदें सांगीतलें आम्हांसी । जावोनि रहावें ऋष्यमूक पर्वतांसीं । तेथें वाळीसी ऋषिशाप ॥४॥ ऐक शापाचें कारण । दुंदुभि बळें उन्मत्त पूर्ण । वाळीपासीं येवोनि आपण । युद्ध दारुण मांडिलें ॥५॥

संगृहीत्वा विषाणाभ्यां दुंदुभिं गिरिसन्निभम् । पातयामास तं वाली क्षितौ पंचत्वमागतः ॥३॥

चिक्षेप बलवान्वाली पादेनैकेन योजनम् । तस्य वेगप्रविद्धस्य वाक्त्रात्क्षतजबिंदवः ॥४॥

प्रपेतुर्मारुतोत्क्षिप्ता मतंगस्याश्रमं प्रति । तान्दृष्ट्वा पतितांस्तत्र मुनिःशोणितविप्रुषः ॥५॥

उत्ससर्ज महाशापं क्षेप्तारं वालिनं प्रति । इह तेनाप्रवेष्टव्यं प्रविष्टस्य वधो भवेत् ॥६॥

त्या संबंधी शापाचे मूळ कारण : वेगीं धरोनि दुंदुभीसी। वाळीनें आपटितां भूमीसीं । घायें सांडवोनि प्राणांसी । पंचत्वासी पावविला ॥६॥ वाळीनें वेगें वामपदेंसीं । दुंदुभि उडविला आकाशीं । मतंग ऋषीच्या आश्रमासी। रुधिर त्यापासीं पैं स्रवलें ॥७॥ स्रवतां देखोनि रुधिरासी। कोप आला मतंगऋषीसी । तेणें शापिलें वाळीसी। अति आक्रोशीं सक्रोध ॥८॥ ज्याचिया आघातनिजशक्तीं। अशुद्ध स्रवे आश्रमाप्रती। त्यासी रिघतां या पर्वतीं। मरण निश्चितीं पावेल ॥९॥ पाय लावितां ऋष्यमूकासी । शापें मरण आहे वाळीसी । नारद सांगोनि सुग्रीवासी । धाडी वस्तीसी ऋष्यमूका ॥१०॥ ऋष्यमूकीं करितां वसती । होईल वालिभयाची निवृत्ती। थोर पावाल यश कीर्ती । श्रीरघुपतिप्रसादें ॥११॥ नारदवचनें ऋष्यमूकीं । निर्भय राहिलों निजसुखी। वाळिभयाची धुकधुकी । येथें निःशेकी असेना ॥१२॥ शापभय घेवोनि पोटीं । वाळी ऋष्यमूक न पाहे दृष्टीं । येथें यावयाची न करी गोष्टी। सुखसंतुष्टीं असों आम्ही ॥१३॥ नारदवचनाची वचनोक्ती । आजि मज आली प्रतीती । तूं भेटलासी कृपामूर्ती। आम्हीं त्रिजगतीं निजविजयी ॥१४॥

एतत्ते सर्वमाख्यातं विरोधे कारणं महत् । अनागसा मया प्राप्तं स्थानं निर्भयमात्मनः ॥७॥

वैराचे मुख्य कारण : सर्व वैराचें कारण । मुख्य माझे दारहरण । तें म्यां सांगितलें संपूर्ण । निर्भयस्थान ऋष्यमूकीं ॥१५॥ माझी भार्या जे कां रुमा । ते मज पंढियंती जैसा आत्मा । ते सोडविल्या श्रीरामा । सुखसंभ्रमा पावेन ॥१६॥ तारा निजपत्नी वाळीसी। तेणे सुख भोगावें तियेसीं । रुमा माझी मज द्यावी गौरवेंसीं । वैर दोघांसीं असेना ॥१७॥ आम्हां दोघा व्यर्थ विरोध । स्त्रीहरणें वैरदसंबंद । सासामासीं करितां युद्ध । पडियेलें द्वंद्व स्त्रीलोभें ॥१८॥ बहुत युद्ध त्यासीं आम्हांसीं । नेमस्त करितां सासामासीं । सुटका नव्हे निजपत्नीसी । उकसाबुकसीं स्फुंदत ॥१९॥ देखोनि सुग्रीवाचें रुदन । श्रीराम काढी निर्वाणबाण । घायें वाळीचा घेईन

प्राण । सत्य जाण सुग्रीवा ॥२०॥ वाळी सबळ बळवाहन । आतुर्बळी श्रीरघुनंदन । दोघे जण समसमान । न्यून पूर्ण असेना ॥२१॥

वालीचा वध करण्याचे तीन पर्याय : पैल दुंदभिकलेवर जाण। अंगें उचली जो आपण । त्याचेनि हस्तें वालिमरण। मातंगी ऋषि भाषे ॥२२॥ सप्तताड विषम वन । एकें बाणें करी जो छेदन । त्याचेनि हस्तें वालिमरण । ऋषि भाषे मातंगी ॥२४॥

एवमुक्तवतस्तस्य सुग्रीवस्य महात्मनः । राघवो दुन्दुभेः कायं वामांगुष्ठेन चालयन् ॥८॥
लीलयैव महावीर्यश्चिक्षेप दशयोजनम् ॥९॥

दुंदुभीचा मृत देह डाव्या पायाच्या अंगठ्याने रामांनी उडविला : ऐकोनि सुग्रीववचन। स्वयें श्रीराम हास्यवदन । दुंदुभिकलेवर गिरिसमान । देखिलें आपण श्रीरामें ॥२५॥ तें वामांगुष्ठें उचलोन । केलें त्रिवार तोलन । स्वलीला सांडितां हेळसोन । दश योजन उडविलें ॥२६॥ दुंदुभिकाय अति समर्थ । श्रीरामें उडविलें अंगुष्ठवत । तरी सुग्रीव साशंकित । बोले भयभीत तें ऐका ॥२७॥

आर्द्र समांसं प्रत्यग्रं क्षिप्तं कायं च वालिना । सांप्रतं लघु निर्मांसं क्षिप्तं कायं त्वयाद्य वै ॥१०॥
नात्र शक्यं बलं ज्ञातुं तंव वा तस्य वाधिकम् । तालानेतान्सुनिर्भिद्य भवेद्व्यक्तिर्बलाबले ॥११॥

परंतु शुष्क कलेवर उडविल्याने सुग्रीवाचे समाधान झाले नाही : वाळीनें मारोनि दुंदुभीसी । मांसरक्तसार्द्रासी । पायें उडविलें आकाशीं । आम्हां सर्वांसी देखतां॥२७॥ आतां तुवां श्रीरघुनाथा । दुंदुभिकाय अति शुष्कता । वाळून जाला अति लघुता । तो पदघातें उडविला ॥२८॥ ऐसेंही आम्हां देखतां। लक्षेना बळाबळता । विशाल ताड एकें बाणें छेदितां। तैं वाळिहंता तूं होसी ॥२९॥

रामाने बाणाने केलेले सात तालवृक्षांचे छेदन : संदिग्ध वानरवचन । ऐकोनि श्रीरामें चढवोनि गुण । गुणीं लाविला फणीबाण । तालच्छेदन करावया ॥३०॥ विषम तालांची ताडस्थिती। शेषपृष्ठीवरी उत्पत्ती । त्यांसी छेदावया श्रीरघुपती। केली युक्ति ते ऐका॥३१॥ धनुष्य ओढोनी आपण। चेपिला लक्ष्मणाचा चरण। तेणें चुकवितां अंग संपूर्ण। विषम ते सम ताड झाले ॥३२॥ शेषावतार लक्ष्मण तेणें । अंग चुकवितां संपूर्ण । विषम ताड झाले समान । श्रीरघुनंदनें छेदितां ॥३३॥

स गृहीत्वा धनुर्घोरं शरमेकं च राघवः । तालान्भित्वा गिरींश्चैव प्रविवेश रसातलम् ॥१२॥

धनुष्य वाहूनि दुर्धर । गुणीं लाविला अमोघ शर। बाण सोडितां श्रीरामचंद्र । जालें विचित्र तें ऐका ॥३४॥ सप्ततालांतें छेदूनीं । गिरिवरातें विदारूनी । सप्तपाताळ भेदूनी । गेला निघोनि शषांगा ॥३५॥ शेषाचे आंगीं तालमूलता। त्यांतें झाला समूळ छेदिता। परतोनि येवोनि श्रीरामहाता । रिघोनि भातां स्वस्थ राहे ॥३६॥

त्यामुळे सर्वांना विस्मय व आनंद : श्रीरामें छेदिले विषम ताळ । तेणें सुग्रीवा सुखकल्लोळ। जयजयकारें गर्जती सकळ । आम्ही सबळ श्रीरामें ॥३७॥ भवभय ताडविषमता । श्रीरामदृष्टीं होय समता । विषम ताड श्रीराम छेदितां । सुख समस्ता कपिकुळा ॥३८॥ श्रीराम आम्हां सुखसंपत्ती । नीराम आम्हां निजविश्रांती। श्रीराम आम्हां साह्यार्थी । निजसांगाती श्रीराम ॥३९॥ श्रीराम आम्हां जिवलग सोयरा। श्रीराम निजात्मा वानरा। श्रीराम स्वामी चराचरां । वंद्य सुरवरां श्रीराम ॥४०॥ ऐसें बोलोनि आपण। सुग्रीवें घातलें लोटांगण । श्रीरामें दिधलें आलिंगन । समाधान जीवशिवां ॥४१॥

श्रीराम सुग्रीवास वालीला युद्धाचे आव्हान देण्यास सांगतात : श्रीराम म्हणे सुग्रीवासी । पुढें जावोनि किष्किंधेसी । वाळीतें पाचारी युद्धासी। तुझे पाठीसीं मी असें ॥४२॥ वाळी आलिया संग्रामासीं । बाणें निवटीन क्षणार्धेसी । तूं तंव भिवों नको त्यासी । निःशंकतेसी

युद्ध करीं ॥४३॥ सुग्रीवा वाळीसीं युद्ध करितां । विसरूं नको मज रघुनाथा। जयो पावसी सर्वथा । सत्वर वचन माथां वंदिलें ॥४४॥

सुग्रीवाचा भुभु:कार ऐकून वालीचे आगमन : ऐसें सांगतां श्रीरघुवीर। सुग्रीवें केला भुभु:कार । कौतुक पाहे श्रीरामचंद्र। वाळी वानर मी मारीन ॥४५॥ वाळी बळिया अति बळी । मीही श्रीराम आतुर्बळी । आजि वाळीची करीन होळी । रणखंदळी पाहे माझी ॥४६॥

एवमुक्त्वा तु सुग्रीवं शूरौ तौ नरवानरौ । जग्मतु:सहातौ शीघ्रं किष्किंधां वालिपालिताम् ॥१३॥
ते सर्वे सहसा गत्वा रामसुग्रीवलक्ष्मणा: । वृक्षैरात्मानमावृत्य ह्यतिष्ठन्गहने वने ॥१४॥

ऐसें बोलतां सुग्रीवासीं। सवेग उठिला सौमित्रेंसीं । येवोनि किष्किंधाप्रदेशीं । वाळिवधासी उद्यत॥४७॥ एका सखा जिवलग सौमित्र । दुजा सुग्रीव सन्मित्र। दोघे घेवोनि वेगवत्तर । श्रीरामचंद्र निघाला ॥४८॥ एक जाले नरवानर। वानरवीरांचा संभार। अवघे करिती जयजयकार । किष्किंधाद्वार ठाकिलें ॥४९॥ श्रीराम सुग्रीव आणि सौमित्र। तिघे चालती एकत्र। आनंदे गर्जती वानर । किष्किंधाद्वार पावले॥५०॥ जेंवी आत्मा देहाआंत । असोनि न देखती समस्त । तेंवी श्रीराम त्या वानरांत । ठेविला अति गुप्त जनदृष्टीं ॥५१॥ वालिसुग्रीवयुद्ध अतिदुर्धर । पहावया श्रीरामचंद्र । वनीं वसोनि अगोचर। नरवानर न देखती ॥५२॥ निकट न देखती नरवीर । देखों न शकती ऋषीश्वर । त्यांसी केंवी देखे वाळी वानर । अगोचर श्रीराम ॥५३॥ गोचरा न दिसे अगोचर। हें तंव मूळींचेंचि ब्रह्मसूत्र। जवळी असतां श्रीरामचंद्र । नरवानर न देखती ॥५४॥ असो हे कथा अति विस्तार । श्रीराम कोणा नव्हे गोचर । साधु जाणती हा विचार । श्रीरामचंद्रगुह्य गुप्त ॥५५॥ सुग्रीवें घालोनियां कांस । गाहोनि श्रीरामाची वास। भुभु:कारें अति उल्लास। नांदे आकाश दुमदुमिलें॥५६॥ सुग्रीवाच्या गिरागजरें । दिवसा पडती नक्षत्रें । डळमळिलीं मेरुशिखरें । गिरिकंदरें दुमदुमिलीं ॥५७॥ दिग्गजांची बैसलीं टाळीं । नादें गजबजिला वाळी । ऐसा कोण आला बळी । प्रळयआरोळी देवोनी ॥५८॥ दूत सांगती वाळीसी । सुग्रीव आलासे युद्धासी । हें सामर्थ्य नाहीं त्यासी । शक्ति अनारिसी दिसतसे ॥५९॥ त्यासी कोणी भेटला बळी । त्याचेनि देतो महा आरोळी। ऐसें विचारोनि वाळी। कांस तत्काळीं घातली ॥६०॥ आजिचें युद्ध अति संकटीं। विजयमाळा घातली कंठीं । तरी धाकतसें पोटीं । आरोळी मोठी ऐकोनी ॥६१॥ आजि मरणें कीं मारणें । दोहींचें वैर आजि छेदणें । ऐसा निश्चय करोनि तेणें । युद्धा येणें क्रोधें ॥६२॥

श्रुत्वा तु निनदं भ्रातु: क्रुद्धो वाली महाबल:। निष्पपात सुसंरब्धो भास्करोऽस्ततटादिव ॥१५॥
तत: सुतुमलं युद्धं वालिसुग्रीवयोरभूत् तलैरशनिकल्पैश्च वज्रकल्पैश्च मुष्टिभि: ॥
जघ्नतु: समरेऽन्योन्यं भ्रातरौ क्रोधमूर्च्छितौ ॥१६॥

दोघांचे घनघोर युद्ध : ऐकोनि सुग्रीवाची आरोळी। युद्धा क्रोधें आला वाळी। दोघे भिडती क्रोधानळीं । महाबळी वानर ॥६३॥ वालिसुग्रीव युद्धव्युत्पत्ती। ब्रह्मादि देव पाहूं येती । नभ दाटलें विमानपंक्तीं। दोहींची शक्ती लक्षावया ॥६४॥ समानबळ दोहीं वीरीं । युद्धव्युत्पत्ती दोघां पुरी । कवणा जया कवरा हारी । पाहूं सुरवरीं येइजे ॥६५॥ दोघां होतां दृष्टादृष्टी । क्रोपोद्भव उठिला पोटीं । समबंधुत्वा पडिली तुटी । स्त्रीलोभासाठीं अपघात ॥६६॥ जेंवी ग्रहणपर्वणीसीं । ग्रासूं धांवे राहू सूर्यासी । तेंवी वाळी सुग्रीवासी । निर्दळावयासी धांवत ॥६७॥ वाळी पर्वत हाणी दारुण । सुग्रीव मुष्टिघातें करी चूर्ण । शाल ताल मानी कोण । रणमदें पूर्ण उन्मत्त ॥६८॥ दोहींची अदट आंगवण । अंग घटलें करितां रण । घाय हाणिती दारुण । भ्याडांचें प्राण निघो पाहती ॥६९॥ वज्रपाय कराभिघाता । निष्ठुर मुष्टि हाणिती माथां । परस्परें तडवे देतां। अति निघाता पेटले ॥७०॥ दंडीं मुंडपीं उरीं शिरीं। घाय हाणिती

शिरोदरीं । जानु हाणिती उरावरी । ताडिती कोंपरीं येरयेरां ॥७१॥ दोघां जेत्यांचा आवांका। लाविती पुच्छांचा तडाका । परस्परें हाणिती थडका । उठला धडका अंतराळीं ॥७२॥ एका एका तळीं वरी । दोघे तळपती चक्रापरी। दोघे उसळती गगनोदरीं। निराधारीं भिडती ॥७३॥ घाय हाणिती महाबळीं । न्याहो उठिला पाताळीं । कृतांताची बैसली दांतखिळी । देता आरोळी गर्जोनी ॥७४॥ क्षण एक युद्ध पृथ्वीवरी । क्षण एक युद्ध गगनोदरीं। युद्धलाघवता वानरीं। सुरासुरीं विस्मयो ॥७५॥ बाप बळिये दोघे वानर । वीर धीर महाशूर । दोघे योद्धे अति दुर्धर । येरयेरां नाटोपती ॥७६॥

धनुरादाय काकुत्स्थस्तावुभौ समुदैक्षत । अन्योन्यसदृशौ वीरावुभौ देवाविवाश्विनौ ॥१७॥
यन्नावगच्छत्सुग्रीवं वालिनं वापि राघव: । ततो न कृतवान्बुद्धिं मोक्तुमंतकरं शरम् ॥१८॥

दोघात कमालीचे साम्य असल्यामुळे श्रीरामास बाण सोडता येईना : दोघे वीर रणप्रवीण । देखोनि वानरांचें रण । संतोषला श्रीरघुनंदन । बळ समान दोहींचें ॥७७॥ दोघे वानर अनन्य। सबळ बळें समसमान । देखोनि श्रीरामें योजिला बाण । वाळी विंधोन मारावया ॥७८॥ तंव वाळी सुग्रीव दोघे जण । ठाणमाण वर्णलक्षण । रूपरेखा समसमान । कोणास बाण विंधावा ॥७९॥ जैसे कां दोघे अश्विनौ देव । समरूप समानभाव। तैसेचि वाळीसुग्रीव । समावयव सारिखे ॥८०॥ श्रीराम सज्जूनियां बाण । स्वयें जाला विस्मयापन्न । दोघांमाजी वाळी कोण । कोणासी आपण वधावें ॥८१॥ न कळोनियां विंधूं जातां । अवचट जालिया सुग्रीवघाता। तेव्हां मी जालों विश्वासहंता। भाकही वृथा होय माझी ॥८२॥ बाण लागलिया अवचितां। श्रीरामें मारिलें शरणागता। ऐसें निंद्यत्व बैसेल माथां। क्षोभ समस्तां पूर्वजांसी ॥८३॥ मुख्य क्षोभेल हरिश्चंद्र । शिबी भगीरथ पृथु नरेंद्र । काकुस्थ दिलीपादि नृपवर। वंशींचे समग्र क्षोभती ॥८४॥ रुक्मांगद धर्मांगध । सूर्यवंशींचे वीर अगाध । अवघे क्षोभती प्रबुद्ध [२]। केलें विरुद्ध श्रीरामें ॥८५॥ शरणागता वज्रपंजर। मिथ्या मिरवी श्रीरामचंद्र । ऐसें निंदितील सर्वत्र । लागल्या शर सुग्रीवा ॥८६॥ ऐसें विचारोनि जाण। श्रीराम न विंधीच बाण। तंव वाळीनें केलें आन[३] । जयो आपण पावावया ॥८७॥ वीर्य धैर्य आंगवण। सबळ बळें दोघे समान । वाळीनें जाणोनि आपण केलें विंदान[४]। निजविजया ॥८८॥ सुग्रीव नाटोपे निजबळें । वाळीस कळलें युद्धसमेळें । मग दाखविलें वरदमाळे। जयकाळें विजयार्थी ॥८९॥ युद्ध करितां वर्षानुवर्षी। श्रम खेद नव्हे दोघांसी । वाळी जाणोनि मानसीं। मग माळेसी प्रयोजी[५] ॥९०॥

एतस्मिन्नंतरे भग्न: सुग्रीवस्तेन वालिना । अपश्यद्राघवं नाथमृष्यमूकं ययौ जवात् ॥१९॥

बहुतकालपर्यंत युद्ध झाल्याने सुग्रीव सुवर्ण-माळेपुढे मूर्च्छित : होता विरदमालादर्शन। सुग्रीवशक्ति झाली क्षीण । भोंवडी येवोनि पडे आपण । मूर्च्छित पूर्ण ऋष्यमूकीं ॥९१॥

कष्टाने ऋष्यमूक पर्वतात पडला : रणीं मूर्च्छित पडतां पहा हो। सुग्रीवें सांभाळिला आवो। उडोनि ऋष्यमूकीं पहा हो। पडे महाबाहो मूर्च्छित ॥९२॥ करावया सुग्रीवाचा अंत । वाळी रिघों न शके ऋष्यमूकांत। वाळी निजविजयें गर्जत। व्यर्थ रघुनाथ साह्य केला ॥९३॥

सुग्रीव उद्विग्न व त्याचा रामांवर आरोप : धरोनि श्रीरामांचें बळ । मगसीं करूं आलासी सळ[६] । युद्धीं केलासी विकळ । व्यर्थ तळमळ कां करिसी ॥९४॥ मजसीं करावया संग्राम। सन्मुख राहों न शके राम। सांडीं स्त्रीराज्याचा[७] श्रम । व्यर्थ श्रम करूं नको ॥९५॥ सुग्रीवा दिधलें रे जीवदान । न मारीं ऋक्षराजाची आण । ऐसें वाळी गर्जोन । गेला निघोन किष्किंधे ॥९६॥ विजयाच्या जयजयकारीं। वाळी प्रवेशला नगरीं। सुग्रीव ऋष्यमूकामाझारीं। दु:खेंकरीं विलपत ॥९७॥

शब्दार्थ : १. क्रोध करतील, २. ज्ञाते, ३. दुसरेच, ४. युक्ती, ५. योजना केली, ६. तंटा, युद्ध, ७. स्त्रीचा व राज्याचा

अपश्यद्राघवं नाथमृष्यमूकं प्रदुद्रुवे । क्लांतो रुधिरसिक्तांगः प्रहारैर्जर्जरीकृतः ॥२०॥
राघवोऽपि सह भ्रात्रा सह चैव हनूमंता । तदेव वनमागच्छत्सुग्रीवो यत्र वानरः ॥२१॥

वानरांचा संभ्रमः सुग्रीव पडतांचि मूर्च्छित । वानर झाले हाहाभूत । वाळिभयें भयभीत । वानरें पळत ऋष्यमूकीं ॥९८॥ वाळीच्या घायीं जर्जरीभूत । रक्तें न्हाणिला धगधगीत । सुग्रीव अति दुःखें विलपत । साह्य रघुनाथ नव्हेचि ॥९९॥ वाळिवधाचा आक्रम । श्रीरामें दावोनि पराक्रम । करविला युद्धधर्म । अति दुर्गम वाळीसी ॥१००॥

सुग्रीवाचा शोक व श्रीरामास दूषण : वाळी वधावया तत्काळ । धरोनि श्रीरामांचें बळ । निःशंक युद्ध केलें तुंबळ । अति सबळ वाळीसीं ॥१॥ श्रीरामबळाचा निजनेट[1] । युद्ध केलें कडकडाट । श्रीरामें पाहिला माझा शेवट । घायवंट[2] जंव पडें ॥२॥ वालीनें केला जर्जरीभूत । तरी साह्य नव्हे श्रीरघुनाथ । दैवें आलों ऋष्यमूकांत । येऱ्हवीं प्राणांत पावतों ॥३॥ पडतों ऋष्यमूकाबाहेरी । तरी वाळी मारिता क्षणामाझारीं । श्रीराम होवोनि साहाकारी । रणद्वारीं गांजिलो ॥४॥ श्रीरामाचें साह्यबळ । रणरंगी जालें विफळ । सुकली कृपेची पैं ओल । पायीं सखोल गांजिलो ॥५॥ श्रीरामें हारविली निजकांता । तो काय मज साह्य होईल आतां । वृथा बोलणें श्रीरघुनाथा । मज तत्वतां मानलें ॥६॥ श्रीराम सत्य सर्वज्ञ । राज्य त्यजोनि आला वना । तोही माझिया संरक्षणा । मिथ्याप्रतिज्ञ होवोनि ठेला ॥७॥ ऐसा सुग्रीव विलपत । तंव लक्ष्मणहनुमंतांसमवेत । तेथें आला श्रीरघुनाथ । कृपावंत कृपाळू ॥८॥

आह्वयस्वेति मामुक्त्वा दर्शयित्वा च विक्रमम् । वैरिणा घातयित्वां मां किंत्विदानीं करिष्यसि ॥२२॥

स्वमुखें सांगे श्रीरघुनाथ । वाळीसी पाचारीं युद्धार्थ । दृष्टीं पडतांचि करीन घात । तुझा कार्यार्थ साधीन ॥९॥ ऐसें बोलोनि आपण । वाळीसीं मज लाविलें रण[3] । घायी माझा निघतां प्राण । साह्य संपूर्ण नव्हेचि ॥११०॥ आतां येवोनियां येथ । काय साधिसी कार्यार्थ । वाळी गेला नगरांत । निजविजयार्थ साधोनी ॥११॥ वाळीनें करितां अति निर्वाण । नाहीं ढळलों अणुप्रमाण । वरदमाळा दावितां जाण । मूर्च्छापन्न[4] मी पडिलों ॥१२॥ दैवें पाडिलें ऋष्यमूकांत । येऱ्हवीं वाळी करिता माझा घात । साह्य नव्हसीच मूर्च्छित । दुःखाभिभूत[5] मज केलें ॥१३॥ मी मूर्च्छित होतां विमुख । पाठीसीं घालोनि निःशंक । वाळीसीं नव्हसीच सन्मुख । परम दुःख मज दिधलें ॥१४॥ साह्य होवोनियां करावें सुखी । श्रीराम सत्यवादी तिहीं लोकीं । तुवां मज केलें परम दुःखी । तेही लटकी कीर्ति केली ॥१५॥ सुग्रीव देखोनि दुःखाभिभूत । कळवळला श्रीरघुनाथ । त्याचें ऐकोनि रुदित । स्वयें बोलत कृपाळु ॥१६॥

सुग्रीव श्रूयतां तात क्रोधश्च व्यपनीयताम् । कारणं येन बाणोऽयं न मया विनियोजितः ॥२३॥
अलंकारेण वेषेण प्रमाणेन गतेन च । त्वं च सुग्रीव वाली च सदृशौ स्थः परस्परम् ॥२४॥

रामाने कारणाचे स्पष्टीकरण करून सुग्रीवाची खात्री केली : क्रोध सांडोनि सावधान । सुग्रीवा ऐकें माझें वचन । साह्य न व्हावयाचें कारण । झालें विंदान[6] परियेसी ॥१७॥ गुणीं लावोनियां बाण । वाळीचा म्यां घ्यावा प्राण । तंव तुम्हीं बंधु दोघे जण । समसमान भासलेती ॥१८॥ वस्त्रें अलंकार आभरण । रूपरेखा समसमान । न कळे वाळीचें निजचिन्ह । यालागीं बाण न विंधींच ॥१९॥ न कळोनि बाण विंधितां । जरी तुज लागता अवचितां । तरी श्रीरामें मारिलें शरणागता । निजजघन्यता[7] तिहीं लोकीं ॥१२०॥ अवचटें तुज लागल्या बाण । मग म्यां त्यजावा कीं आपुला प्राण । ऐसें जाणोनियां आपण । शरसंधान न करींच ॥२१॥

शब्दार्थ : १. मोठी भिस्त, २. जखमी होऊन, ३. निकराची लढाई, ४. मूर्च्छा येऊन, ५. दुःखाने व्यापलेला, ६. चमत्कार कौतुक, ७. आपला कमीपणा.

तुझेनि कैवारें एकाएक । वाळीसीं युद्ध करिता देख । तेथेंही थोर आहे अटक । जरी सन्मुख वरदमाळा ॥२२॥ जो जो युद्ध करी संमुख । वरदमाळा करी विमुख । मज नाहीं होणें पराङ्मुख । ते मज अटक युद्धार्थी ॥२३॥ युद्ध न करावया हेंचि कारण। साह्य व्हावें तंव दोघे समान। यालागीं मीं न विंधींच बाण । सत्य जाण सुग्रीवा॥२४॥ व्यर्थ कां होसी खेदयुक्त। हा तुझा प्रारब्धभोग निश्चित । आणि वाळीचें काहीं आयुष्यप्राप्त। तेणें पदार्थ ऐसा घडला ॥२५॥ घायें घ्यावया वाळीचा प्राण। आतां मी घेतों धनुष्यबाण। मज मारितां न लगे क्षण । युद्धाक्रमण[१] करीं वाळीसीं ॥२६॥

सुग्रीवाचे समाधान व वालीशी युद्धाची ईर्ष्या : सुग्रीव म्हणे नाहीं शक्ती । केंवी मी पाचारूं युद्धार्थी । कृपेनें आलिंगी श्रीरघुपती । अमृतहस्तीं स्पर्शिला ॥२७॥ आलिंगनमिषें जाण। दिधली निजशक्ती संपूर्ण। पहिल्यापेंक्षां शतगुण । आंगवण[२] सुग्रीवा॥२८॥ सुग्रीव पाहे सावधान। अंगीं न देघे घाय ना वण । पुरती बाणली आंगवण । वाळीसीं रण करावया ॥२९॥ सुग्रीव उठे ते काळीं। प्रतापें बोले श्रीरामाजवळी । आजि मी लोळवीन वाळी। रणकल्लोळीं विचरूनी ॥१३०॥ ऐसें बोलोनि श्रीरामाजवळी । वेगीं उठिला तत्काळीं । युद्ध करावया बळी । उडे अंबरीं सुग्रीव ॥३१॥

या वेळी राम खुणेसाठी सुग्रीवाच्या गळ्यांत गजकमलमाला घालतात : श्रीरामें पाचारोनि त्यासी । समरूपता तुम्हां दोघांसी । युद्धी ओळखावया सुग्रीवासी। घालवी त्यासी गजमाळा[३] ॥३२॥

गजपुष्पीमिमां फुल्लामुत्पाट्य शुभलक्षणाम् । कंठे कुरु त्वं सौमित्रे सुग्रीवस्य महात्मनः ॥२५॥

गजकमळमाळा सुलक्षण । श्रीरामें निर्मोनियां आपण । सुग्रीवकंठीं घातली संपूर्ण । ओळखण रणरंगी ॥३३॥ गजांतलक्ष्मी यावयासी । गजकमळमाळ घातली त्यासीं । तेचि ओळखण रणभूमीसीं । वालिवधासी मुख्य मूळ ॥३४॥ श्रीरामाज्ञा अति समर्थ । माळा न तुटे युद्धाआंत । लागतां वीराचे आघात । भंगातीत[४] राममाळा॥३५॥ लक्ष्मण विंदानीं महाबळी । कमळांच्या अष्टदळीं । सबाह्य लिहिल्या नामावळी । आर्तुबळी तेणें जाला ॥३६॥ गुणेंवीण[५] निजकमळा । निर्गुणगुंती गुंफिली माळा। घालितां सुग्रीवाच्या गळां । कळिकाळा नावरे ॥३७॥ सुग्रीवकंठी घालितां माळ। हरिकला वानरांचा पाळ[६]। नळ नीळ तार तरळ । सैन्य सकळ समुदावा ॥३८॥

सुग्रीवाचे उड्डाण व भुभु:कार, वालीला आव्हानः श्रीराम सौमित्र हनुमंत । सुग्रीव वानरांसमवेत। आले किष्किंधेपर्यंत। हर्षयुक्त उल्लासें ॥३९॥ अति आक्रोशें महाथोर। सुग्रीव करी भुभुःकार । ऐकोनि कोपला वाळी वानर । युद्ध दुर्धर[७] करूं पाहे ॥१४०॥ दोघे बंधु क्रोधयुक्त । युद्ध करिती अत्यद्भुत। वाळी वधील श्रीरघुनाथ । तोही गुह्यार्थ अवधारा ॥४१॥ एकाजनार्दना शरण । पुढें गोड निरूपण। श्रीरामें वाळिउद्धरण । संसारतरण श्रीरामें ॥४२॥ श्रीरामनामें द्वयअक्षर । क्षराक्षरातीत[८] पर । रामनाम स्मरे निरंतर । पावन नर तिहीं लोकीं ॥४३॥ रामनाम पडतां एकाएक । तोहीं तिहीं लोकीं अलोकिक। एकाजनार्दनीं होत एक। नित्य निष्टंक श्रीराम॥४४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सुग्रीवभंगो नाम पंचमोऽध्यायः ॥५॥ ॥ओंव्या॥१४४॥ श्लोक ॥२५॥ एवं ॥१६९॥

---

शब्दार्थ : १. युद्धाला आरंभ, २. बळ, सामर्थ्य, ३. गजकमळांची माळ, ४. भंगरहित अभंग, ५. दोरावाचून, ६. समुदाय, ७. महाभयंकर, ८. चेतनाचेतनांहून वेगळा.

# अध्याय सहावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

## वालीचा वध

श्रीराम हनुमंत सौमित्र । सुग्रीवसमवेत वानर । पावोनि किष्किंधेचें द्वार । केला भुभुःकार सुग्रीवें ॥१॥

अथ तस्य निनादं तं सुग्रीवस्य महात्मनः । शुश्रावांतःपुरगतो वाली भ्रातुरमर्षणः ॥१॥

सुग्रीवाचेनि गिरागजरें । नादें दुमदुमिलें अंबर । कोसळों पाहे गिरिकंदर । वाळीचें मंदिर दणाणलें ॥२॥

सुग्रीवाची गर्जना ऐकून वालीचा संताप : ऐकोनि सुग्रीवाची आरोळी । कोपें खवळलासे वीर वाळी । आरक्त जाला क्रोधानळीं । जेंवी कुलाचळीं[1] बालसूर्य ॥३॥ वाळी विचारी हृदयांत । आतांच युद्धीं जर्जरीभूत । म्यां पाडिला होता मूर्च्छित । सवेंचि गर्जत केंवी आला ॥४॥ माझ्या घायें मासानुमास । कुंथत पडे वर्षानुवर्ष । सवेंचि आला युद्धास । अति उल्लासें गर्जत ॥५॥ आतां असो हा विचार । बंधु वैरी सत्य साचार । रणीं पाचारितां महाशूर । निघावें सत्वर युद्धासीं ॥६॥

सुग्रीवाला रामांचे साहाय्य आहे तरी हे शत्रुत्व संपवावे असा तारेचा उपदेश : युद्धा निघतां वाळीसीं । तारा लागली पायांसी । स्वहित सांगेन तुम्हांसी । विवेकेंसीं अवधारिजे ॥७॥ तुझे लागल्या घाये । सुग्रीव कुंथत पडिला राहे । तो सवेंचि येवोनियां बाहे । गर्जत आहे युद्धार्थी ॥८॥ हे तंव नव्हे सुग्रीवशक्ती । तेणें साह्य केला श्रीरघुपती । त्याचेनि बळें युद्धप्रती । आला मागुती गर्जत ॥९॥ तुझा करावया घात । सुग्रीवा साह्य श्रीरघुनाथ । हां तुज न कळे अर्थ । बळोन्मत्त धांवसी ॥१०॥ तुवां जिंतिलें सुरनरांसी । मर्दिलें दैत्यदानवांसी । काखे सूदिलें रावणासी । श्रीरामापासीं ते न चाले ॥११॥ श्रीराम प्रतापें तेजोराशी । पूर्णावतार सूर्यवंशीं । ऐक त्याचिया प्रतापासी । मी तुजपासीं सांगेन ॥१२॥ जे कां अटक[2] तिहीं लोकां । श्रीरामें वधिली ते ताटका । छेदोनि सुबाहूच्या मस्तका । मारीच देखा उडविला ॥१३॥ चवदा सहस्र निशाचर[3] । सहित त्रिशिरा दूषण खर । श्रीरामें मारिले समग्र । बाणीं दुर्धर विंधोनी ॥१४॥ विंधोनियां एक बाण । विराधाचा घेतला प्राण । काळ कबंध मारिला जाण । प्रतापी पूर्ण श्रीरामा ॥१५॥ ज्या धनुष्यें गांजिला रावण । तें चाप श्रीरामें भंगोन । केलें जानकीवरण । जामदग्न्य[4] जिंकिला ॥१६॥ श्रीरामाच्या बाणाभेण । भिकारी झाला पैं रावण । चोरोनि केलें जानकीहरण । देवोनी बलिदान मारीचाचें ॥१७॥ धांवण्या आलिया श्रीरघुनंदन । एकेंचि घाये होईल प्राण । येणें भयें तो रावण । गेला पळोन लंकेसी ॥१८॥ ऐसा श्रीराम दुर्धर तयापुढें तूं वानर । बळोन्मत्त पालेखाइर[5] । युद्धा सत्वर धांवसी ॥१९॥ विंधोनियां एक बाण । श्रीराम तुझा घेईल प्राण । हें तंव माझें सत्य भाषण । युद्धा आपण नव जावें ॥२०॥ श्रीरामीं न करावा विरोध । त्यांसी करावया सख्यसंबंध । माझा ऐकोनि अनुवाद । युद्धक्रोध सोडावा ॥२१॥

वालीचे तारेला उत्तर, रामांशी विरोध नाही : एकोनि तारेचें उत्तर । वाळी म्हणे सत्य साचार । मज श्रीरामासीं नाहीं वैर । अणुमात्र मानसीं ॥२२॥ जे जे रामीं करिती विरोध । त्यांचा श्रीराम करील वध । हा मज कळला शुद्धबोध । कथानुवाद अवधारीं ॥२३॥ ताटका सकळ लोकांतें बाधी । यालागीं नीराम तीतें वधीं । सुबाहु यज्ञातें अवरोधी । रामें त्रिशुद्धि

शब्दार्थ : १. हिमालयादि आठ मुख्य पर्वतांस कुलाचल म्हणतात, २. प्रतिबंध, ३. राक्षस, ४. परशुराम, ५. पाला खाणारा.

मारिला ॥२४॥ विराधें केलें सीताहरण। श्रीरामें वधिला विंधोनि बाण। कबंधे धरिले दोघे जण। बाहु छेदोन मारिला ॥२५॥ करोनि शूर्पणखेचा कैवार। हिरूं आले सीता सुंदर। श्रीरामें वधिले त्रिशिरा खर। तैसें वैर मजसीं नाहीं ॥२६॥ मारीच मारिला कपटी पूर्ण। सीताहरणें वैरी रावण। तैसें विरोधलक्षण[1]। मजसीं जाण असेना ॥२७॥ मी तंव केवळ निरपराध। कैसेनि श्रीराम करील वध। करितां सुग्रीवासीं रणविरोध। वैरसंबंध कां श्रीरामीं ॥२८॥

तारेचे पुन: सांगणे की सुग्रीव श्रीरामांचा शरणागत आहे म्हणून रामांचा विरोध: तारा स्वयें सांगें संपूर्ण। सुग्रीव श्रीरामा झाला शरण। श्रीराम शरणागता शरण्य[2]। संरक्षण सर्वार्थी ॥२९॥ शरणागता जो विरोधी। तो श्रीरामाचा मुख्य द्वंद्वी[3]। त्यासी श्रीराम स्वयें वधी। जाण त्रिशुद्धि कपिराया ॥३०॥ शरणागताचिये घाता। श्रीराम करों नेदी सर्वथा। हेचि श्रीरामेंसीं वैरता। आत्मघाता निजमूळ[4] ॥३१॥ तुटे सुग्रीवेंसीं विरोध। श्रीरामासीं होय तैं सुहृदसंबंध[5]। तैसा साधीं निजबोध। माझा शब्द जरा करिसी ॥३२॥

श्रूयतां क्रियतां चैव तव वक्ष्यामि यद्धितम्। रायौवराज्येन सुग्रीवं तूर्णं साध्वभिषेचय ॥२॥
विग्रहं मा कृथा वीर भ्रात्रा राजन्यवीयसा। अहं हि ते क्षमं मन्ये तेन रामेण सौहृदम् ॥३॥

श्रीरामांशी सख्य केले तरच शांती व समाधान लाभेल: वाळी ऐकें सावधान। तुझें निजस्वहित सांगेन। सखा केलिया रघुनंदन। होसी पावन तिहीं लोकीं ॥३३॥ श्रीरामीं सख्य घडे कशानें। ऐसा विकल्प[6] मानिसीं मनें। तेंही निमेषार्धे साधीन। माझें वचन जरी करिसी ॥३४॥ जेणें आप्त होय श्रीरघुनाथ। तारे सांगे मनोगत। येरी सांगत उल्लासत। पूर्ण हितार्थ देखोनी ॥३५॥ विरोध तुटे बंधुबंधूंसी[7]। पूर्ण सख्य होय श्रीरामासीं। यौवराज्य द्यावें सुग्रीवासीं। निजहितासी लक्षोनी ॥३६॥ सुग्रीवा यौवराज्य देतां। परम सुख श्रीरघुनाथा। तिघा होईल ऐक्यता। एकात्मता अति प्रीती ॥३७॥ जैसा तुज प्रिय अंगदु। तैसा सुग्रीव कनिष्ठ बंधु। त्यांसी सांडितां विरोधु। सख्यसंबंधु श्रीरामीं ॥३८॥ ऐसें बोलोनियां पाहें। तारेनें धरिले दोनी पाये। श्रीरामीं सख्ये सुख आहे। करीं लवलाहें कपिराजा ॥३९॥ रत्नाभरणीं[8] धनवस्त्रांसीं। अंगद धाडीं श्रीरामापासीं। शरण रिघोनियां त्यासी। आपणासी वांचवीं ॥४०॥ श्रीरामा रिघतां शरण। तुझें चुकेल जन्ममरण। दोघे बंधु पावोन बुझावण[9]। कृतकल्याण पावसी ॥४१॥ जरी धरोनि गर्वबळ। श्रीरामेंसीं करिसी छळ[10]। तरी किष्किंधा सांडोनियां पळ। श्रीराम सबळ युद्धार्थी ॥४२॥ व्हावया श्रीरामासमोर। धीर न धरिती सुरासुर। तेथें तूं केवळ वानर। पालेखाइर कैंवी राहसी ॥४३॥ श्रीरामीं सख्य करीं निर्मळ। अथवा उठोनियां पळ। त्यासीं करितां युद्ध प्रबळ। तूं तत्काळ मरसील ॥४४॥ लागतां श्रीरामाचा बाण। मेरुमांदारां होय विदारण। तेथें तुझा केवा[11] कोण। बळें प्राण देऊं नको ॥४५॥ माझें नायकतां भाषण। तूं बैससी मरणा धरण। श्रीराम विरोधिल्या जाण। जीवें प्राणें तो नुरे ॥४६॥

वालीचा प्रकोप: ऐकोनि तारेचें वचन। वाळी जाला कोपायमान। भ्याडप्रकृति[12] तुम्ही स्त्रिया जाण। कंपायमान परदर्पे[13] ॥४७॥ सुग्रीवासी यौवराज्य देतां। मी न देवोदीं सर्वथा। साह्य जालिया श्रीरघुनाथा। राज्य सर्वथा न देणें ॥४८॥ देखोनि श्रीरामाचें बळ। म्हणसी वानर हा निर्बळ। किष्किंधा सांडोनियां पळ। भयें प्रबळ जल्पसीं ॥४९॥ तारे ऐक माझी शक्ती। अल्प सांगेन तुजप्रती। युद्धा आलिया श्रीरघुपती। शंका चित्तीं मज नाहीं ॥५०॥

उत्पाटयतु रामो वा बाहुभ्यां विंध्यपर्वतम्। इमां सर्वां समुद्रांतां संचालयतु वा महीम् ॥४॥
सचंद्रतारानक्षत्रं पतेदत्र ससागरम्। न विव्यथेऽहं समरे सुग्रीवं प्रति संहत: ॥५॥

---

शब्दार्थ : १. वैरांचे लक्षण, २. रक्षणकर्ता, ३. शत्रू, ४. मुख्य कारण, ५. स्नेहसंबंध, ६.संशय, शंका, ७. बंधुबंधुंमध्ये, ८. रत्नाच्या अलंकारांनी, ९. समजूत, १०. कपट, ११.पाड, १२. भित्र्या स्वभावाच्या, १३. दुसऱ्याच्या पराक्रमाने.

वालीचा सामर्थ्याची प्रौढी : बाहुबळें श्रीरघुनाथ। उत्पाटू विंध्यपर्वत। पृथ्वी समुद्रवलांकित। करो भस्मांत बाणे एके ॥५१॥ सचंद्र तारा गगन गंभीर। सहित सप्तही सागर । बाणें शोषो श्रीरामचंद्र । तरी मी वानर न शंकें ॥५२॥ ऐसा पुरुषार्थ श्रीरघुनाथा । प्रत्यक्ष डोळ्यांदेखतां । मज बाधीना भयव्यथा। उल्लासता संग्रामीं ॥५३॥ रणीं मरणें भयभीत। त्यासी यश ना पुरुषार्त। तैसा मी वाळी नव्हें एथ । रणीं रघुनाथ सुखी करीन ॥५४॥ सुग्रीव बापुडें किंकर । श्रीराम योद्धा रणवीर । त्यासीं मी भिडेन वानर । युद्ध दुर्धर पाहें माझें ॥५५॥ माझी पुरे आंगवण। ऐसा योद्धा आहे कोण। करावया श्रीरामासीं रण। आलें स्फुरण बाहूंसी॥५६॥ श्रीराम आलिया संमुख। प्रतिज्ञेची देवोनि हाक। युद्ध करीन अपराङ्मुख[1]। वाळी युद्धासीं पैं आला ॥५७॥

स वाली बलदप्तात्मा मुष्टिमुद्यम्य वीर्यवान् । सुग्रीवमेवाभिमुखो ययौ योद्धं कृतक्षणः ॥६॥
सुग्रीवोऽपि समुद्दिश्य वालिनं हेममालिनम् । श्लिष्टं मुष्टिं समुद्यम्य संरब्धतरमागतः ॥७॥
सुग्रीवेण तु निःशंकं सालमुत्पाट्य तेजसा । गात्रेष्वभिहतो वाली व्यपतत्स महीतले ॥८॥

पुनः वाली-सुग्रीव युद्ध : वालिसुग्रीवां दृष्टिभेटीं । होतां वळोनि निजवज्रमुष्टी । युद्धक्रोधा महाहठी। उठाउठीं मिसळले॥५८॥ उरीं शिरीं गुडघेमुष्टी। धांवोनि हाणिती पुसाटी[2]। तडवा[3] हाणोनि पाडिती सृष्टीं । दोघे हट्टी महावीर ॥५९॥ हेममुकुट हेममाळा। शोभती वाळीचिया गळां। सुग्रीवा शोभे कमळमाळा । रणसोहळा वीरांचा ॥६०॥ मुष्टिघात चपटेघात। निष्ठुर हाणिती आघात। दोघांही रुधिर प्रवाहत। जेंवी पर्वत गैरिकां[4]॥६१॥ किंशुक[5] फुलले वसंतांत। तैसें दोघे वीर अति आरक्त। रणामाजी विचरत। बलोन्मत्त युद्धक्रोधें॥६२॥ सुग्रीव लक्षोनियां दृष्टीं। वाली हाणी वज्रमुष्टीं। मूर्च्छापन्न पडतां सृष्टीं। धैर्यें जगजेठी ऊठिला ॥६३॥ सुग्रीव क्षोभोनि ते वेळीं । शालवृक्षें ठोकिला वाळी। घाये मूर्च्छित महीतळीं। महाबळी लोळविला॥६४॥ वाळी पांडिला महावीर । वानर करिती हाहाकार । ऐकोनि वीरांचा गजर । वाळी सत्वर उसळला॥६५॥ बाहु आफळोनि[6] वाळी। रणीं गर्जत क्रोधानळीं। कोपें सुग्रीव चालिला बळी । रणीं रवंदळी करावया ॥६६॥ सम तळपणें सम किराणा[7] । गति विगति सम उड्डाणा। क्षणें भूमीं क्षणें गगना । युद्धविंदान दोहींचें ॥६७॥ दोघे बळें अति समर्थ। येरयेरां नाटोपत । दोघां लाभेना विजयार्थ। अति सामर्थ्येंकरोनियां ॥६८॥ वाळी बळी वरदमाळा । श्रीराममाळा सुग्रीवगळां। पाहतां त्यांचा रणसोहळा। समबळ समान ॥६९॥ युद्धकंदनें खेदक्षीण। श्रमस्वेदें दोघे क्षीण । ऐसें देखोनि श्रीरघुनंदन । धनुष्य बाण सज्जिला ॥७०॥

सुग्रीवाला भूमीवर पाडला त्याच वेळी रामांनी वालीवर बाण सोडला : सुग्रीव तळवटीं आणिला। ऐसें श्रीरामें देखिलें डोळां। आतां न मारितां वाळीला। गोष्टी होईल पहिल्याऐसी॥७१॥

ततः संधाय रामेणा शरमाशीविषोपमम् । वेगेनाभिकहतो वाली निपपात महीतले ॥९॥

आक्रमें मारावया सुग्रीवासी । वाळी उडतां आकाशीं । श्रीरामें विंधितां वेगेंसीं । शरू सपिच्छीं खडतरला॥७२॥ जेंवी सर्प रिघे वारुळीं। तैसा बाण हृदयकमळीं। प्रवेशोनि अंतकाळीं । पाडिला वाळी मूर्च्छित ॥७३॥ जैसा ईश्वर राहोनि गुप्त । निमेषमात्रें करी निःपात । तैसा अतर्क्य श्रीरघुनाथ । करी वाळीचा घात बाणाग्रें ॥७४॥ अतर्क्य सद्गुरुवचन। श्रवणेंचि शिष्या समाधान। तैसा श्रीरामाचा बाण। सुखसंपन्न वाळीसी ॥७५॥ जैसा धडधडीत वन्ही[8]। सुखरूप सतीलागोनी। तैसें श्रीरामाचें बाणीं। वाळीलागोनी सुखरूप ॥७६॥ जेंवी कां सुख शुद्ध सात्विकी । अग्रीं कठिण गोड परिपाकीं । श्रीरामबाण तदनुलक्षीं ।

शब्दार्थ : १. तोंड न फिरविता, २. शेपटी, ३. हस्तहप्रार, ४. गेरूने, ५. पळस, ६. ठोकून, ७. उड्या, ८. अग्नी

उभयपक्षीं सुखरूप ॥७७॥ सुग्रीवासी सुख लौकिक । वाळीस सुख त्याहूनि अधिक । बाण विंधोनियां एक । दिधलें सुख दोहोंसी ॥७८॥ श्रीराम बाणाचा प्रताप । सुग्रीव भ्रमतां भयकंप । परी एक सुखरूप । श्रीराम चिद्रूप कृपाळु ॥७९॥ श्रीरामबाणाग्रीं भासे दुःख। तेंचि परिपाकीं[1] परम सुख । वदेल वाळीचें निजसुख । श्रोतीं सकळिक परिसावें ॥८०॥

**वालीला मूर्च्छा, सावध होऊन त्याने रामाचा अधिक्षेप केला :** श्रीरामाच्या निजवाणीं। वाळी मूर्च्छित पडिला धरणीं[2] । बोले श्रीरामा अनुलक्षोनी। अधर्मकरणी तुवां केली ॥८१॥

पराङ्मुखवधं कृत्वा को नु प्राप्तस्त्वया गुणः । यदहं युद्धसंरब्धस्त्वत्कृते निधनं गतः ॥१०॥
शोचामि नात्मानमहं न तारां नापि बांधवान् । त्वत्कृतेन ह्यधर्मेण यथा शोचामि राघव ॥११॥

मी आणिकासीं युद्धासक्त । श्रीरामा तूं अति गुप्त। पराङ्मुखीं[3] केला घात। कोण पुरुषार्थ श्रीरामा ॥८२॥ न पाचारितां एकाएक । अतर्क्यरूपें निजघातक । तुझा हा अधर्म देखोनि देख। परम दुःख माझे मनीं ॥८३॥ नाहीं राज्यहरणाची व्यथा । तारावियोग न बाधी चित्ता । तुझी देखोनि अधर्मता । दुःख रघुनाथा मज भारी ॥८४॥ नव्हे सुहृद्दुःख बाधक । बाधेना अंगदाचा शोक । तुझा अधर्म देखतां देख । परम दुःख मज रामा ॥८५॥ वध करों नयें निद्रिस्था । वधूं नये स्त्रियेसीं रमतां । वधूं नये न पाचारितां । पुरुष दुश्रित नयें वधूं ॥८६॥। तूं सर्वज्ञ श्रीरघुनाथा। ऐसिया जाणोनि शास्त्रार्था । अधर्में करोनि माझे घाता। अपेश माथा घेतलें ॥८७॥ तूं चंद्राहूनिं अति चोख। श्रीरामकीर्ति नित्य निर्दोख । अधर्मघाताचा[4] कळंक । त्यावरी देख बैसविला ॥८८॥ सुग्रीव बापुडें तें किती। काय साह्य होईल सीताशुद्ध्यर्थी[5] । ते मज सांगतासी श्रीरघुपती । करितों ख्याती ते ऐक ॥८९॥

सुग्रीवप्रियकामेन यदहं घातितस्त्वया । गले बध्वा प्रदद्यां ते निहतं रावण रणे ॥१२॥
न्यस्तां सागरतोये वा पाताले वापि मैथिलीम् । आनयेऽहं तवादेशाद्गरुडेनामृतं यथा ॥१३॥

**रावणाकरिता अधर्म का केला :** रावण माझा काखवळ। गळां बांधोनि तत्काळ । आणितों न लगतां पळ। तूं माझें बळ नेणसी ॥९०॥ समुद्रजळीं सप्तपाताळीं। शोधोनि लोकालोकाचळीं[6]। आणितों मी जनकबाळीं। तुजजवळी निमेषार्धे॥९१॥ चतुःसमुद्रीं प्रातःस्नान । करितां मजला न लगे क्षण । बळे मजपुढें तुच्छ रावण । सीता आणोन मी देतों ॥९२॥ मज हा सांगतासी विचार । सीतासती रावण सहपरिवार । लंका उपडोनि समग्र । येथें सत्वर आणितों ॥९३॥ सुग्रीवाच्या पक्षपाता। अधर्मेकरितां माझ्या घाता। अपेश आलें श्रीरघुनाथा । कीर्तीचे माथां अपकीर्ती ॥९४॥ पुढे साचार श्रीरघुपती। जरी करिसी कोटिकीर्ती। तरी अधर्मघाताची अपकीर्ती । तिळभरी परती ढळेना ॥९५॥ नाहीं रडत राज्यहरणासी । नाहीं मी रडत निजमरणासी । अधर्म जडला श्रीरामचरणांसी । तेणें मानसीं अति दुःखी ॥९६॥ सेवकें कीर्ती करावी ऐसी। जगत्रय वंदी स्वामिसेवकांसी। सुग्रीवें गौरविलें श्रीरामासी । कीर्तिवंतासी अपकीर्ति ॥९७॥ सुग्रीवें काय केला उपकार। म्यां तुज काय केला अपकार। ऐसा न करितां विचार। मज सत्वर कां वधिलें॥९८॥ संग्रामीं वधितासी सन्मुख[7]। त्या मरणाचा मज हरिख[8]। कीर्ती वर्णितें तिन्ही लोक । तें आवश्यक चुकलासी ॥९९॥ अधर्में वधितां वाळीसी। श्रीरामहस्तें उद्धार त्यासी। मज यश तूं अपेशी। कीर्ती अति विशेषी त्वां केली ॥१००॥

**श्रीरामांचे वालीला समर्पक उत्तर, त्यामुळे त्याचे परिवर्तन :** श्रीरामहस्तें मज मरण । तेणें मी त्रैलोक्यीं पावन । तुज तुवां लाविलें दूषण। अधर्मे बाण विंधोनी ॥१॥ ऐकोनि वालिनिंदावचन।

शब्दार्थ : १. शेवटी, २. पृथ्वीवर, ३. सन्मुख न आलेल्या माझ्याठायी, ४. अधर्माने मारलेल्याचा, ५. सीताशोधार्थ, ६. या नावांचे पर्वत आहेत. ७. पुढे, ८. आनंद.

दुःख न मानीच रघुनंदन । काय बोलिला धर्मवचन । गुह्यज्ञान हितकारी ॥२॥ पुढिल्या[१] स्वधर्म शिकविती । स्वयें अधर्म आचरती । तयां मूर्खांची वाचावंदती[२] । सत्य मानी तोचि महामूर्ख ॥३॥

अद्य धर्ममधर्मं च जानासि त्वं कपीश्वर । कृतं कर्म न जानासि भ्रातृभार्याविमर्शनम् ॥१४॥

माझा बाण भेदल्यापाठीं । सांगतोसी या स्वधर्म गोष्टी । आपल्या अधर्माची रहाटी । निजात्मदृष्टीं न्याहाळिसी ना ॥४॥ कन्या भगिनी भ्रातृपत्नी। कन्येसमान या तिन्ही। ते बंधुभार्या त्वां हिरोनी। अनुदिनीं भोगिसी ॥५॥ तारेसारखी पतिव्रता । तुज असतां सुंदर कांता[३] । कां बंधुभार्या अधर्मता । तूं कां भोगिता जालासी ॥६॥ आपली नाठवे अधर्मता। अधर्म ठेविसी माझे माथां । अधर्माची संसर्गता। भासे अशुद्धता शुद्धत्वीं ॥७॥ जेंवी का स्फटिक नित्य निर्मळ । त्यासी भेटतांचि काजळ । शुद्धता लोपोनि तत्काळ । भासे सकळ काळिमा ॥८॥ स्फटिक काजळें दिसतो काळा । परी तो काळिमेवेगळा[४] । तेंवी पापपुण्या निराळा । राम चित्कळा[५] चिन्मूर्ति[६] ॥९॥ नभीं नीळिमा नाहीं अळुमाळ[७] । निळें डोळ्याचें निजबुबुळ । तेणें नभ देखती सुनीळ । डोळ्यांचे मळ नभीं दिसती ॥१०॥ तेंवी मी राम नित्य शुद्धात्मा । तूं मज म्हणसी अधर्मकर्मा। तुझे छेदावया पापभ्रमा। अगाध महिमा बाणाच्या ॥११॥ तुझे अंगीं पाप सदोष। तुजला मी केंवी भेटेन सन्मुख। छेदावया तुझे महादोष । बाण अतर्क्य विंधिला॥१२॥ मी विश्वात्मा विश्वतोमुख । साधुसंतां नित्य सन्मुख। तूं पापात्मा नित्य विमुख । बाणें निर्दोष केलें तुज ॥१३॥ बाण विंधोनि अतर्क्यता । तुझी छेदोनि पापात्मता । कृपेनें भेटलों मी आतां । तुज तत्वतां तारावया ॥१४॥ तुज मारावया हेंचि कारण । माझ्या सुग्रीवाचा बंधु पूर्ण । तुझा चुकवावया नरक दारुण । पापनिर्दळण बाणें केलें ॥१५॥ शरणागताचा निजबन्धु । त्यासी जालिया नरकबाधु । हा मज न साहे शब्दु। बाणें अति शुद्ध केलासे॥१६॥ सांडोनियां विकल्पवृत्ती। जो जो लागेल मद्भक्त संगतीं । तो तो उद्धरीं मी श्रीरघुपती। वाळी निश्चितीं तूं जाण॥१७॥ तुझे अंगीं पाप दारुण। तेणें यम दंडिता तुज पूर्ण । तें चुकवावया विंधिला बाण। पुरश्चरण[८] महापापा॥१८॥ श्रीरामकृपेचा प्रताप । वाळीचें सरे निजपाप । तेणें पावोनि अनुताप । निर्विकल्प विनवित ॥१९॥

एवमुक्तस्तु रामेण वाली प्रव्यथितो भृशम् । प्रत्युवाच ततो रामं प्रांजलिर्वानरेश्वरः ॥१५॥

स्वतःबद्दल वालीला पश्चात्ताप : राज्यमदें अति घूर्ण[९]। पाप आचरलों संपूर्ण। तुवां कृपेनें सोडोनि बाण । केलें निर्दळण अकल्पित॥१२०॥ तुवां कृपेनें विंधोनि बाण । छेदिला त्रिविध अभिमान। कुळाभिमान कर्माभिमान। गर्वाभिमान शौर्याचा ॥२१॥ श्रीरामबाणाचा प्रताप । छेदी संकल्प विकल्प । छेदोनियां पुण्य पाप । नित्य निष्पाप केलें मज ॥२२॥ वाढिवेचा[१०] गर्व परम। सन्मुख न करीच संग्राम। दुश्चिता मारणें अकर्म । मानीं अधर्म श्रीरामीं ॥२३॥ पूर्ण पापी मी परम । श्रीरामीं मानीं अधर्म । श्रीराम परमात्मा परब्रह्म। हें मी वर्म नेणेंचि ॥२४॥ प्रवृत्तिज्ञानें मी उन्मत्त । रामा मानीं अधर्मरत । श्रीराम स्वधर्मकर्मरहित। हा मुख्यार्थ श्रीरामीं॥२५॥ तुझेनि बाणें हृदयांत। केलें हृदय शुद्ध समस्त। आतां अनुभवासींहि येत । श्रीरघुनाथ परब्रह्म ॥२६॥ लटकें सीतेचें धांवणें । लटका तुवां शोक करणें । दीन उद्धरावयाकारणें । विचरत वनीं वनवासीं ॥२७॥ वना येवोनि श्रीरघुनंदन। उद्धरिले तृणपाषाण। पावन केले दीन जन । जगदुद्धरण श्रीराम ॥२८॥

राम राम महाभाग जाने त्वां परमेश्वरम् । अजानता मया किंचिदुक्तं तत्क्षंतुमर्हसि ॥१६॥

शब्दार्थ : १. दुसऱ्याला, २. बडबड, ३.स्त्री, ४. काळेपणाहून निराळा, ५. ज्ञानाची कळा, ६. ज्ञानमूर्ती, ७. थोडी-देखील, ८. सिद्ध मंत्राचा विबक्षितसंख्याक जप, ९. मदांध, १०. पराक्रमाचा.

अनुजानीहि मां राम यांतं त्वत्पदमुत्तमम् । मम तुल्यबलें बालें अंगदे त्वं दयां कुरु ॥१७॥

रामांची स्तुती करून वाली क्षमा मागतो : मायानियंता ईश्वर । त्याहूनि तूं परात्पर । तुझ्या स्वरूपाचा पार । अगोचर श्रुतिशास्त्रां ॥२९॥ ऐसिया तुज श्रीरघुनाथा । कर्मज्ञानाची योग्यता । निषेधिलासी अधर्मता । तें मज आतां क्षमा करीं ॥१३०॥ जळापासव लवण होय । तें जळींचें जळीं विरोनि जाय । मोतीं जालें तें तंव कठिण पाहें । जळीं न जाय विरोनि ॥३१॥ मुक्तपणें मोला चढलें । ते वनिताधरीं फांसां पडिलें । मुक्तचि परी नासा[1] आलें । कठिण केलें अभिमानें ॥३२॥ जळो हा कर्मधर्माभिमान । जळो हा सज्ञाना ज्ञानाभिमान । तेणे अभिमानें बंधन जाण । म्यां तुज पूर्ण निंदिलें ॥३३॥

वालीची क्षमायाचना : कर्मज्ञानाच्या व्युत्पत्तीं । निर्भर्त्सिलासी दुष्ट दुरुक्तीं । ते मज क्षमा करीं श्रीरघुपती । कृपामूर्ति कृपाळुवा ॥३४॥ ऐसें बोलोनि आपण । वाळी घाली लोटांगण । मस्तकीं धरोनि श्रीरामचरण । म्हणे आपण क्षमा कीजे ॥३५॥ आणिक एक माझे चित्तीं । जें जें वर्तत आहे श्रीरघुपती । तें मी सांगेन तुजप्रती । अंगदार्थी अवधारीं ॥३६॥ मजसमान बळिया दृढ । अंगद माझें लळिवाड । त्यांसी करावा रणसुरवाड[2] । पुरवीं कोड[3] युद्धाचें ॥३७॥ अंगद माझा कनकांगदी[4] । सबळ साह्य होईल युद्धीं । म्हणोनि लाविला श्रीरामपदीं । कृपानिधि कृपा करीं ॥३८॥ अंगदा निरवोनिया जाण । वाळी जाला सावधान । पाहोनी श्रीरामाचें वदन । उल्लासोन बोलत ॥३९॥

श्रीरामांचे आश्वासन : तुझें निजपद सनातन[5] । जे कां सच्चिदानंदघन । तें पावावया त्यजितो प्राण । लाविले नयन वाळीनें ॥४०॥ देखोनि वाळीचें प्रेम पूर्ण । कृपें कळवळला श्रीरघुनंदन । स्वयें बोले मेघश्याम । सावधान अवधारा ॥४१॥

वालीच्या पश्चात्तापामुळे रामाचा कळवळा : वाळी नको रे त्यजूं प्राण । तुझा उपडोनियां बाण । सामर्थ्ये वांचवीन जाण । सुख संपूर्ण भोगावया ॥४२॥ सीताशुद्धी साह्य देख । तूं मज होसी आवश्यक । भोगीं ताराअंगदा राज्यसुख । मरणोन्मुख होऊं नको ॥४३॥ गळां बांधोनि रावण । सीता आणीन मी आपण । तें तूं सत्य करीं वचन । साह्य संपूर्ण मज होईं ॥४४॥

वालीचा देहत्यागाचा आग्रह : ऐकोनि श्रीरामाचें वचन । वाळी जाला हास्यवदन । पूर्वील माझा बळाभिमान । गेला पळोन तुजपुढें ॥४५॥ सूर्यापुढें जेंवी खद्योत[6] । तेंवी देखोनियां श्रीरघुनाथ । सबळ बळ विरालें समस्त । तेज अद्भुत श्रीरामीं ॥४६॥ तुझिया निजप्रतापापुढें । रावण दहा तोंडांचे किडें । मी मशक साह्य कोणीकडे । सामर्थ्य गाढें श्रीरामीं ॥४७॥ तुझा सुटलिया बाण । बापुडें रावण तें कोण । होय त्रैलोक्यनिर्दळण । बळ संपूर्ण श्रीरामीं ॥४८॥ भोगावया स्त्रीपुत्रसुख । आजि वांचावें आवश्यक । स्त्रीभोग परम दुःख । निजनिष्टंक म्यां मानिलें ॥४९॥ तुझी विक्षेपभृकुटी[7] । रणीं आटील सकळ सृष्टी । तेथें कायसी वानरसाह्यगोष्टी । रावण कपटी केंवी उरे ॥१५०॥ स्त्रीसुखभोगाचा अनुवाद । सख्या बंधूसीं पाडी विरोध । स्वार्थघातक दुर्धर क्रोध । नित्य निरोध तो विषय ॥५१॥ श्रीरामां तूं निजविवेकी । विषय भोगितां उभय लोकीं । कोणी तरी जाला सुखी । निजदुःखी तो विषयो ॥५२॥

त्यजाम्यसून्महायोगिन्दुर्लभं तव दर्शनम् । यन्नामविवशो गृह्णन्म्रियमाणः परं पदम् ॥१८॥

न करितां योगयागसाधन । तुझे दृष्टीपुढें देह त्यागून । मी होईन कृतकल्याण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥५३॥ अंतकाळी अवचटें जाण । केल्या रामनामस्मरण । परमपदप्राप्ति

शब्दार्थ : १. नाकांत, २. लढाईची हौस, ३. आवड, ४. स्वर्णमय बाहुभूषणे धारण करणारा, ५. शाश्वत, ६. काजवा, ७. क्रोधाने भ्रकुटी (भोवया) व झाल्या असता.

पूर्ण । जन्ममरण मग कैचें ॥५४॥ आजिचे ऐसें रघुनाथा। पुढें मरण न ये हाता। तेंही ऐक सावधता । माझ्या निजहिता लक्षोनी ॥५५॥

विशल्यं कुरु मे राम हृदयं पाणिना स्पृशन् । हृदयाद्बाणमुद्धृत्य रामः पस्पर्श पाणिना ॥१९॥
त्यक्त्वा तद्वानरं देह स यातः परमां गतिम् ॥२०॥

रामनामाच्या कडकडाटीं । दोष जळती अकल्प सृष्टी । परम पद पावे शेवटीं । नित्य नेहटी श्रीरामनामें ॥५६॥ एवढी ज्याची नामख्याती । तो तूं स्वयें रघुपती । कृपेनें भेटलासी अंतीं । जिणें[1] पुढतीं मज नको ॥५७॥ आतां नको विषयाचरण । आतां नको जन्ममरण । भावें धरोनि श्रीरामचरण । वाळी आपण विनवित ॥५८॥ तुझे हातींचा लागतां बाण । मी जालों अति पावन। तुझा लागतां पद्महस्त पूर्ण। वांछित मरण सुखार्थी ॥५९॥ तुझा लागतां पद्महस्त । मी झालों नित्यमुक्त । सच्चिदानंदपद पूर्ण प्राप्त । मज निश्चित तुझेनि ॥१६०॥

वालीच्या देहात रुतलेला बाण श्रीरामांनी काढला, त्याचे प्राणोत्क्रमण : ऐकोनि वाळींचे वचन। हृदयीं भेदला जो बाण। तो श्रीरामें उपडोनि आपण। केलें स्पर्शन अमृतहस्तें ॥६१॥ लागतां श्रीरामाचा हस्त । वाळी देहीं देहातीत । बंधा मोक्षा अतीत[2]। केला निश्चित श्रीरामें ॥६२॥ श्रीरामहस्त मस्तकसांटीं[3]। वाळीस सुखरूप जाहली सृष्टी । परमानंदी पडली मिठी । कृपादृष्टी श्रीरामें ॥६३॥ म्यां सुग्रीवासी केला विरोधु। परी सुग्रीव सत्य परम सखा बंधु । त्याचेनि पावलों परमानंदु। सुखावबोधु श्रीराम ॥६४॥ यापरी वाळीनें आपण । वानरदेह त्यागोनि जाण। श्रीरामकृपेस्तव संपूर्ण । निजपदीं पूर्ण विनटला[4] ॥६५॥ विरोधरूपें श्रीरामें आपण। केलें वाळीचें उद्धरण। एकाजनार्दना शरण। कृपा पूर्ण श्रीरामाची ॥१६६॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां वाळिवधोनाम षष्ठोऽध्यायः ॥६॥ ओंव्या ॥१६६॥ श्लोक ॥२०॥ एवं ॥१८६॥

## अध्याय सातवा

॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥

### सुग्रीवराज्याभिषेक

वालीच्या निधनाने वानरांचा घबराट : श्रीरामाच्या दृढबाणीं । घायें वाळी पडिला रणीं । लोळतां देखोनि धरणीं । वानरां पळणी मांडली ॥१॥

निहते वालिनि रणे रामेण परमात्मना । जग्मुस्ते वानराः सर्वे किष्किंधां भयविह्वलाः ॥१॥
तारामूचुर्महाभागे हतो वाली रणाजिरे । अंगदं परिगृह्यार्थ मंत्रिणं परिनोदय ॥२॥
चतुर्द्वारकपाटादीन्बद्धा रक्षामहे पुरीम् । वानराणां तु राजानमंगदं कुरु भामिनि ॥३॥

श्रीरामाच्या बाणनेटीं । वाळी पडिला देखोनि दृष्टीं । वानरसेना भयसंकटीं । उठाउठीं पळाली ॥२॥ वाळी मारिला विंधोनि पूर्ण। सैन्यावरी सोडील बाण। अवघियांचा घेईल प्राण । पलायमान तेणें धाकें ॥३॥ श्रीरामबाण अति दुर्धर । घायें निवटिले त्रिशिरा खर। चवदा सहस्र निशाचर। बाणीं सत्वर निर्दळिलें ॥४॥ श्रीराम जीवें उरों नेदी । जो देखे तो समूळ वधी । तेणें भयें वानरमांदी[5] । किष्किंधेमधीं पळाली॥५॥ वानर चळचळां कांपत। अवघे आले किष्किंधेआंत। सांगती श्रीरामें केला वालिघात। तेणें आकांत नगरीं होय॥६॥

तारेचा सहगमनाचा निश्चय : तारेसी सांगती सुभट[6]। दुर्धर दुर्ग करीं बळकट। चहूं द्वारीं

शब्दार्थ : १. जगणे, २. पलीकडील, निराळा, ३. मस्तकाचे ठिकाणी, ४. रंगला, शोभला, ५. वानरांचा समुदाय, ६. मोठमोठे योद्धे

देवोनि कपाट । देई राज्यपट अंगदासी ॥७॥ ऐकोनि वाळीचें मरण ।अंगदातें हातीं धरोन। तारा निघाली आपण । आक्रंदन करीताचि ॥८॥ वाळी निमालियापाठीं । कायसी अंगदाची गोष्टी । कैचें राज्य कैंची सृष्टी । देह उठाउठी त्यागीन ॥९॥ कैचें घर कैचें दार । कैंचे दुर्ग कैचें नगर । कैचें प्रधान कैंचा परिवार । मरणतत्पर आजि मी ॥१०॥ हृदयी भेदिला श्रीरामबाण । वाळी निमाला निजप्राण । त्यातें तारा देखोन । मूर्च्छापन्न ते पडिली ॥११॥ सर्वेचि आक्रंदोनि उठी । दु:खें मस्तक भूमीं आपटी। गडबडत लोळे सृष्टीं। हृदय पिटी आक्रोशें ॥१२॥ केश सुटले मोकळे । अश्रुधारा स्त्रवती[१] डोळे। दु:खें पुनः पुन्हा लोळे। आरंबळे अति दु:खें ॥१३॥ गेलें माझें वैभव पूर्ण । गेलें माझें भोगभुवन । सुखसौभाग्या पडिलें खान[२]। निजनिधान अंतरलें ॥१४॥ अंतरलिया निजपती । प्रिया[३] पावे उपहती[४]। उपयोगा न ये ते धर्मार्थी। शुभकार्यार्थी अशुभ ॥१५॥ त्यजिलीं अलंकार आभरणें। त्यजिलीं सर्वांगभूषणें । गळसरी राखिली तिणें। पतीसीं करणें सहगमन ॥१६॥ सांगती वृद्ध वृद्ध वनिता । अंगदासारिखा पुत्र असतां । सकळ राज्य येतां हाता। देह कां व्यर्थ त्यागिसी ॥१७॥ भ्रताराच्या सुखासमान। पिता भ्राता सुत स्वजन । सर्वथा नव्हेति वो जाण । तेंही लक्षण अवधारीं ॥१८॥

मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितंसुत: । अमितस्य हि दातारं भर्तारं का न पूजयेत् ॥४॥
शोणे उरसि लग्नेन जीवितप्राणहारिणा । परिष्वक्तुं न शक्नोमि भुजाभ्यां त्वां हरीश्वर ॥५॥

वैधव्य आल्यानंतर सहगमन करणे हाच उत्तम मार्ग असे तारेचे उत्तर : पिता जालिया समर्थ। कन्येसी देणें परिमित । बंधूसी जालिया राज्य प्राप्त। नियत अर्थ भगिनीसी ॥१९॥ पुत्र जालिया राज्यधर । मातेसी दे परिमित उपचार । सर्वसत्ता दे भ्रतार । त्यासीं मी शरीर केंवी वंचूं ॥२०॥ गजांत लक्ष्मी पतीलागूनी। त्याची स्त्री म्हणवी स्वामिनी । हें नव्हे पित्या-पुत्रापासूनी । भ्रतारावांचूनी निंद्य जिणें ॥२१॥ पतीसवें सहगमन । न करितां मागें येईल मरण । तें मरणाचि निंद्य जाण । अध:पतन रांडवा ॥२२॥ धर्मकर्मार्थविहीन । विधवा नारी प्रेतासमान । हें तंव श्रुतिशास्त्रवचन । सुख कोण वैधव्याचें ॥२३॥ पतीसवें होतां सती। इहलोकीं पुण्य परत्रीं[५] मुक्ती । एवढी सांडोनिया प्राप्ती। पुत्रराज्यार्थी सुख काय ॥२४॥ पतीसीं देतां आलिंगन । हृदयीं श्रीरामाचा बाण । भेदला देखोनि संपूर्ण । तारा उद्विग्न अति दु:खी ॥२५॥ सेजेचा निर्दाळिला पती । खेंव न देववे प्रेताप्रती । ऐसें वैर केलें श्रीरघुपती । तारा शापोक्ती क्षोभली ॥२६॥

न सीता मम शापेन त्वां रंतुं प्रतिवत्स्यति । याच्यमाना त्वया सीता पुनर्यास्याति मेदिनीम् ॥६॥

पतिदु:खाच्या दु:खावर्ती । तारा क्षोभोनियां चित्तीं। शाप देत श्रीरघुपतीप्रती । तेही अति युक्तीं अवधारा ॥२७॥ विभांडूनियां[६] लंकापती । तूं तंव पावसी सीता सती। परि ते नांदेना तुजप्रती । जाईल मागुती वनवासा ॥२८॥ दोघां नांदतां अयोध्येसीं। श्रीराम तूं बलात्कारेंसीं । वना धाडिसील सीतेसी । मजऐसा हाती अति दु:खित ॥२९॥ सीता वनवासी वनाआंत। लहु कुश जन्मती सुत। बारा वर्षे अयोध्येंत। अति दु:खित श्रीरामा ॥३०॥ लंकेसीं दिव्य घेईल पाहीं । सीता सती लोकीं तिहीं । येथें दवडावया कारण कायी। जग अन्यायी तुज म्हणेल ॥३१॥ वाळी मारिला त्वां वृथा । हें अपेश बैसलें तुझिया माथां । दुजें अपेश श्रीरघुनाथा। वना सीता दवडोनी ॥३२॥ पुत्रांचिया युद्ध ख्याती। अयोध्ये आणिसील सीता सती । तरी नांदेना तुजप्रती । जाईल मागुती धरणीमाजी ॥३३॥

तारेच्या शापावर वालीची प्रतिक्रिया : श्रीरामासी शापवचन। ऐकोनि तारेचें भाषण। वाळी

शब्दार्थ : १. वाहूं लागले, २. दरवडा, ३. स्त्री, ४. नाश, ५. परलोकी, ६.पराभव करून.

होवोनि सावधान । काय आपण बोलत ।।३४।। तारेसी म्हणे मूढमती । पतिव्रतें तूं महासती। शाप देऊं नको श्रीरघुपती। तो परब्रह्ममूर्ति परमात्मा ।।३५।। अंगीं जंव होती विषयासक्ती। तंव राम नोळखवे ब्रह्ममूर्ती। बाणे छेदिली विषयासक्ती। मग स्फूर्ति मज आली ।।३६।। हृदयीं भेटतां श्रीरामबाण । जगाचा न देखें दोषगुण। श्रीराम देखें ब्रह्म पूर्ण। जग संपूर्ण श्रीराम ।।३७।। बाण नव्हे तो निजात्मबोध। समूळ माझा छेदिला भेद। तेणें पावलों परमानंद। आनंदकंद श्रीराम ।।३८।। तुज जैं लागता श्रीरामबाण । तैं तूं पावतीस कल्याण । न देखसी दोषगुण। श्रीराम पूर्ण परात्मा[१] ।।३९।।

तारेला उपदेश : मजसवें नको होऊं सती । जीवित्व अर्पावें रघुपती। तेंचि सतीत्व[२] सत्य त्रिजगतीं। प्रेताप्रति नको मरूं ।।४०।। प्रेतप्रीतीं रिघावें अग्नीप्रतीं। त्या सतिया प्रेतभूत होती। डांकाभोगी अवतरती[३]। भोग मागती विषयांचे ।।४१।। तैसें न करावें आपण। जीवित्व करावें रामार्पण। श्रीरामाचें निजवचन । अणुप्रमाण नुल्लंघीं[४] ।।४२।। अंगदा धरोनि आपण। तोही करावा रामार्पण। श्रीरामकृपेस्तव जाण । सुख संपूर्ण पावाल ।।४३।। ऐसी तारेसी सांगोनि युक्ती । स्वानंदे बोले सुग्रीवाप्रती। तूं तंवजिवलग सांगाती। रामप्राप्ती तुझेनि ।।४४।।

भ्राता सहोदरो मे त्वं सखा चेष्टकरस्तथा । इदं हि प्रतिपद्यस्व राज्यमेतद्वनौकसाम् ।।७।।
सुषेणदुहिता चेयमर्थसूक्ष्मविनिश्चये । यदेषा साध्विति ब्रूयात्कार्यं तन्मुक्तसंशयम् ।।८।।
एष तारात्मजः श्रीमांस्त्वया तुल्यपराक्रमः । यौवराज्येऽभिषेक्तव्यस्तेजस्वी तरुणोंऽगदः ।।९।।

सुग्रीवाला आदेश : सुग्रीवा म्यां केलें दृढ वैर। परी तूं सखा सहोदर[५]। भेटवोनि श्रीरामचंद्र । यमप्रहार चुकविला ।।४५।। चुकविला माझा भयशोक। चुकविलें जन्ममरणदुःख। श्रीरामप्राप्तिपरमसुख । अलौलिक मज दिधलें ।।४६।। तुझा मी काय होऊं उत्तीर्ण[६]। अगाध सुख तुझेनि पूर्ण। कांही एक देईन अणुप्रमाण[७]। कृपा करोन अंगीकारीं ।।४७।। मज व्हावया उत्तीर्ण । किष्किंधेचें राज्य पूर्ण। अंगीकारावें आपण। सखा परिपूर्ण तूं माजा ।।४८।। सुषेणाची कन्या तारा । सारासारविवेकचतुरा । इच्या मानोनि विचारा । राज्यभारा चालवावें ।।४९।। अंगदा यौवराज्य देवोनी। प्रतिपाळावा ळळा पाळूनी। तूंचि पिता तूंचि जननी । श्रीराम भजनीं लावीं यांसी ।।५०।। प्रथम निर्दाळावया उद्भट[८]। अंगद तुजपुढें सुभट[९]। रणीं राक्षसां करील पीठ । घेईल त्रिकूट लंकेचें ।।५१।। आम्हांसी श्रीरामे बळ । आम्ही श्रीरामबळें सबळ। श्रीरामाचे भजा तुम्हीं सकळ । राम केवळ परब्रह्म ।।५२।। श्रीराम सद्गुरु निश्चित। श्रीराम आम्हां गणगोत । आमचें सर्वस्व श्रीरघुनाथ । कुळदैवत श्रीराम ।।५३।। तारा अंगद आणि सुग्रीव। भावें भजा श्रीरघुराव। हेंचि तिहीं लोकीं गौरव। अति अपूर्व आम्हांसी ।।५४।।

सुग्रीवाचे प्रतिवचन व आश्वासन : ऐकोनि वाळीचें वचन। सुग्रीवें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले वालिचरण। काय आपण बोलत ।।५५।। तुझिया वेराचे विभक्तीं[१०]। स्वामी जोडला श्रीरघुपती। जाली वैराची निजशांती[११]। वानूं मी किती उपकार ।।५६।। मीतूंपणेंसीं तुटलें वैर । सुखेंचि उतरलों भवसागर । जाला वंशाचा उद्धार। हाही उपकार वाळी तुझा ।।५७।। नुल्लंघितां तारेच्या वचनासी। यौवराज्य देईन अंगदासी। सर्वस्वें भजेन श्रीरामासी। भाक[१२] तुजपासीं हे माझी ।।५८।। आम्ही वनचरें वानर । विषयोन्मत्त पालेखाइर । त्या आम्हां जोडला श्रीरामचंद्र । हाही उपकार वाळी तुझा।।५९।। ऐकोनि सुग्रीवाचें वचन । वाळी जाला सुखसंपन्न। विजयमाळा द्यावया आपण । उल्लास पूर्ण वाळीसी ।।६०।।

इमां मालां गृहाण त्वं दत्तां सुग्रीव कांचनीम् । उदारा श्रीःस्थिता यस्यां त्वामेष्यति मृते मयि ।।१०।।
इत्युक्त्वा स च सुग्रीवं रामं प्रांजलिरब्रवीत् । प्राणम्य शिरसा पादौ त्यक्त्वासुं परमां गतिम् ।।११।।

शब्दार्थ : १. परमपुरुष, २. पातिव्रत्य, ३. जन्माला येतात, ४. भांडू नकोस, ५. बंधू, ६. उतराई, ७. थोडे, ८. मोठे शत्रू, ९. महावीर, १०. फुटाफुटीने, ११. पूर्ण लोप, १२. शपथ.

**वालीचे समाधान, सुग्रीवाला माला अर्पण व देहत्याग :** कश्यपदत्त वरदमाळा । वृत्रवधाचिये[1] काळा । घातली इंद्राचिये गळां । जे देखलिया डोळां । वैरी विमुख[2] ॥६१॥ माळा देखलिया संमुख । धाकें वैरी होती विमुख । विजयश्रीचें निजसुख । तिन्ही लोक वानिती ॥६२॥ इंद्रें दिधली मजलागोनी । विजयमाळा हे कांचनी[3] । सुग्रीवासी आलिंगोनी । वाळी आल्हादोनी देता जाला ॥६३॥ सुग्रीवा ही विजयमाळा । म्यां घातलीसे तुझ्या गळां । तूं नावरसी कळिकाळा । भोगीं सोहळा कपिराज्याचा ॥६४॥ विजयमाळेचिया प्राप्तीं । श्रीरामाची सेवावृत्ती । तुझीं त्रैलोक्यीं विस्तरेल कीर्ती । नित्यानुवर्ती[4] श्रीरामाचा ॥६५॥ ऐसें सांगोनि सुग्रीवासी । नमस्कारोनि श्रीरामासी । रामस्मरणें त्यजोनि देहासी । परम गतीसी पावला ॥६६॥

**तारेचे दुःख व विलाप :** वाळीनें सांडिलिया प्राण । तारा अति दुःखीं निमग्न । श्रीरामापासीं येवोनि जाण । काय आपण स्वयें बोले ॥६७॥ वैधव्याचें दुःख शोक । न साहवे क्षणार्ध देख । मी मागेन कांहींएक । तें आवश्यक मज द्यावें ॥६८॥ माझें निर्वाण[5] मागणें । ना न म्हणावें कृपणपणें । मजलागूनी उदार होणें । कृपा करणें श्रीरामा ॥६९॥

राम मां जहि बाणेन येन वाली हतस्त्वया । गच्छामि पतिसालोक्यं पतिर्मामभिकांक्षति ॥१२॥
पत्नीवियोगजं दुःखमनुभूतं त्वयानघ । वालिने मां प्रयच्छ त्वं पत्नीदानफलं लभेः ॥१३॥

वाळी विंधिला जेणें बाणें । मज वधावें बाणें तेणें । सवें जाऊं दोघें जणे । वियोग झणें होऊं देसी ॥७०॥ पत्नीवियोगाचें दुःख । तुवां भोगिलें असे देख । मज बाणें विंधोनियां देख । धाडीं आवश्यक पतीपासीं ॥७१॥ माझी वाट तो पाहत । वाळी राहिलासे तिष्ठत । मजही पाठवावें जी तेथ । पुण्य अद्भुत होय रामा ॥७२॥ मज धाडिल्या वाळीपासीं । पत्नीदानफल लाहसी । जोडती पुण्याचिया राशी । पत्नी पतीसीं भेटविल्या ॥७३॥ ऐकोनि तारेचे बोल । प्रवृत्तिशास्त्र अति सखोल । तें अवघें करावया फोल । राम निश्चळ पूसत ॥७४॥

किं भीरु शोचसे व्यर्थं शोकस्याविषयः पतिः । पतिस्तवास्ति देहो वा जीवो वा वद तत्वतः ॥१४॥

**श्रीराम तारेचे सांत्वन करितात :** तारे एक सावधानेंसीं । तूं काय देहासी पति मानसी । अथवा जीवा पति म्हणसी । तें मजपासीं शुद्ध सांगें ॥७५॥ देहासी सत्य पति मानिसी । तरी तो तुजचिपासीं । सिद्ध असतां शोक कां करिसी । अति उल्लासीं भोगावा ॥७६॥ पति मानिसी जरी जीवासी । तरी त्वां देखिलें नाहीं त्यासी । गेला गेला केंवी म्हणसी । व्यर्थ रांडवलीसी मूर्खत्वें ॥७७॥ जीवासी नाहीं मरणें जिणें । जीवासी नाहीं खाणें भोगणें । जीवासी नाही येणें जाणें । गेला म्हणणें अति मिथ्या ॥७८॥ जीव चिदानंद[7] चैतन्यघन[8] । सर्वीं सर्वत्र परिपूर्ण । त्यासी नाहीं गमनागमन । वृथा रुदन कां करिसी ॥७९॥ घटासी घडीमोडी बहुवस । घडमोड नेणे घटाकाश[9] । तेंवी देहासी होतां नाश । जीव अविनाश नित्यत्वें ॥८०॥ घटीं भरिल्या घृतमद्यांसी । तो लेपून लगे घटाकाशीं । तेंवी देहींच्या पापपुण्यासी । आत्मप्रकाशीं रिघू नाहीं ॥८१॥ आत्मा परिपूर्ण सदोदित । कर्मधर्माविरहित । सुखदुःखांसी अलिप्त । तूं का व्यर्थ विलपसी ॥८२॥

देहो हि काष्ठवद्राम जीवो नित्यश्चिदात्मकः । सुखदुःखादिसंबंधः कस्य स्याद्राम मे वद ॥१५॥

**श्रीरामांचा हितोपदेश :** देह तंव जड काष्ठप्राय । त्यासी सुखदुःख संबंध न होय । आत्मा चैतन्यघन सबाह्य । तेथें न समाय सुखदुःक ॥८३॥ सुखदुःखांचा हा मारा । कोणासी बाधी श्रीरामचंद्रा । याचा उकलू[10] सांगावा खरा । दुःकपरपारा पावावया ॥८४॥ ऐकोनि तारेचा

---

**शब्दार्थ :** १. वृत्तासुराचे वधसमयी, २. पाठमोरे, ३. सुवर्णमय, ४. नित्यचा सेवक, ५. निकराचे, ६. प्रापंचिक व्यवहारशास्त्र, ७. ज्ञानरूपी व आनंदस्वरूपी, ८. स्वप्रकाशपरिपूर्ण, ९. घटातील आकाश, १०. उलगडा.

प्रश्न । स्वयें सांगे श्रीरघुनंदन। जंव देहीं देहाभिमान । दु:स्वप्नबंधन अविवेकिया ॥८५॥ देहीं सबाह्य चैतन्य घन । तेथें मिथ्या भासे देहाभिमान। जेंवी दोराअंगीं सर्पपण। तेंवी संपूर्ण देह मिथ्या ॥८६॥ जन्ममरण देहसंभ्रम। क्षुधा तृषा प्राणधर्म । विषयांचे भोग परम । तें इंद्रियकर्म इंद्रियांचें ॥८७॥ सुख दु:ख भय शोक। मनोधर्म हे आवश्यक। हरि हर ब्रह्मा त्रिगुणात्मक। काल्पिनिक[1] संसार ॥८८॥ आत्मा गुणी गुणातीत । देहीं देहबाधा अलिप्त। तेही विषयींचा दृष्टांत । सुनिश्चित अवधारीं ॥८९॥ स्फटिक कृष्णवर्णे दिसे काळा । पीतवर्णे दिसे पिंवळा। आरक्तें दिसे आरक्तकिळा[2]। तरी तो वेगळा तिही रंगीं ॥९०॥ तेंवी आत्मा संसारांत। त्रिगुणीगुणी गुणातीत । ऐसा जोडला ज्या परमार्थ । त्या नव्हे प्राप्त सुखदु:ख ॥९१॥ ऐसी व्हावया निजप्राप्ती । अवश्य पाहिजे सत्संगतीं । त्याचेनि संगें विषयविरक्ती । तें परमार्थी अधिकार ॥९२॥ शब्दें छेदी विकल्प[3] समस्त। परमानंदें नित्य तृप्त । तैसिया गुरुपासीं परमार्थ । सुनिश्चितार्थ साधावा ॥९३॥ वेदानुवादें[4] सप्रमाण । ऐकोनि सद्गुरुवचन । देहीं मिथ्या देहपण । नित्य चैतन्य अनुलक्षी ॥९४॥ अनुलक्षितां चैतन्य घन । परमानंदीं मूर्च्छापन्न । श्रीरामकृपा पावली पूर्ण । देहाभिमान विसरली ॥९५॥

श्रीरामेणोदितं सर्वं श्रुत्वा तारातिविस्मिता । देहाभिमानजं शोकं त्यक्त्वा नत्वा रघूत्तमम् ॥१६॥
सुग्रीवोऽपि महाबाहु: श्रुत्वा रामस्य भाषितम्। विज्ञाय ज्ञानमखिलं स्वस्थचित्तोऽभवत्तदा ॥१७॥

रामांच्या उपदेशाचा तारा व सुग्रीवावर परिणाम : ऐकोनि श्रीरामांचे वचन। तारा विसरली देहाभिमान। हर्षे घालोनि लोटांगण। श्रीरामाचरण वंदिले ॥९६॥ वाळीनें सांगितलें आपण। ब्रह्मीं ब्रह्मभूत श्रीरामवचन । ते मज पावली निजखूण। ब्रह्म परिपूर्ण श्रीराम ॥९७॥ ताराप्रबोधें श्रीरामवचन । सुग्रीवें ऐकतां आपण । विसरला देंहाभिमान । सुखसंपन्न श्रीरामें ॥९८॥ ऐकोनि श्रीरामवचनोक्ती । तारासुग्रीवां सुखसंविती[5] । दोघां जाली अति प्रीती। विकल्प चित्तीं त्यां नाहीं ॥९९॥

रामाज्ञेने वालीचे दहन व उत्तरक्रिया : दोघां जालें परम समाधान । तंव बोलिला श्रीरघुनंदन। वाळीचें करोनि देहदहन । करावें पिंडदान तिलोदकें ॥१००॥ अंगद सुग्रीव आणि प्रधान। वाळीस पुष्पकीं घालोन । पंपातीरीं केलें दहन । बिल्वचंदनकाष्ठादिकीं ॥१॥ वाळीचें उत्तरविधान। तिलोदकें पिंडदान । करोनि सुग्रीवादि प्रधान। अंगदा घेवोन येते झाले ॥२॥ येवोनियां अवघे जण। वंदोनि श्रीरामचरण । सुग्रीव हात जोडोनि आपण। अंगदा घेवोन उभा ठेला॥३॥ श्रीराम म्हणे हनुमंता । सुग्रीवासी अति शीघ्रता। करावी राज्याभिषेकता । यौवराजता अंगदासी ॥४॥

हनुमंताची विनंती : ऐकोनि श्रीरामाची वचनोक्ती। हनुमंतें केली विनंती। स्वामींनीं येवोनि किष्किंधेप्रती। सुग्रीव राज्यार्थीं अभिषेकावा ॥५॥ आपुलेनि हातें श्रीराघवा। सुग्रीव राज्यीं स्थापावा । हें आवडें आमुच्या जीवा। कृपाळुवा श्रीरामा ॥६॥

रामाचे उत्तर व लक्ष्मणाकडून सुग्रीवास राज्याभिषेक : ऐकोनि हनुमंताचें वचन। संतोषला श्रीरघुनंदन। आपलें नेमाचें लक्षण । स्वयें आपण सांगत ॥७॥

चतुर्दशसमा: सौम्य ग्रामं वा यदि वा पुरम् । न प्रवेक्ष्याम्यहं वीर पितुर्निर्देशकारणात् ॥१८॥

श्रीदशरथाज्ञा शिरीं। चवदा वर्षें निजनिर्धारीं । ग्रामी अथवा नगरीं पुरीं । प्रवेश न करीं नेमस्थ ॥८॥ ऐकोनि नेमाचें वचन। हनुमंते धरिले श्रीरामचरण । सवें धाडावा लक्ष्मण। राज्याभिषिंचन सुग्रीवा ॥९॥ राज्याभिषेचन सुग्रीवासी । रामाज्ञा लक्ष्मणासी । येरें वंदोनिया शिरसीं । सहपरिवारेंसीं चालिला ॥११०॥ राज्यीं स्थापावा सुग्रीव वीर । किष्किंधे चालिला

शब्दार्थ : १. कल्पनेने झालेला, २. तांबड्या प्रभेचा, ३. संशय, ४. वेदांत सांगितल्याप्रमाणे, ५. सुखज्ञान.

सौमित्र । प्रधानवानरपरिवार जयजयकार प्रवर्तला ॥११॥ श्रीरामें तारा पाचारोनी। किष्किंधाराज्यीं तूं राजपत्नी। सुग्रीवातें अंगीकारूनी। माझे आज्ञेनें राज्य करीं ॥१२॥ सर्वा भूती भगवद्भावो । त्यामाजी मानीं सुग्रीवा नाहो[1]। माझे आज्ञेचा भोगीं अनुभवो । देहसंदेहो तेथें नाहीं ॥१३॥ देवराच्च[2] सुतोत्पत्ती। बोलिलें आहे धर्मशास्त्रार्थी । माझिया आज्ञेच्या अनुभूतीं[3]। सुग्रीवाप्रती भजावें ॥१४॥ स्त्रीपुरुष उभय देहीं। आत्म्यांवांचून आत्मी नाहीं । दृष्टि ठेवितां तिये ठायी । देही विदेही सहजत्वें ॥१५॥ हे चुकलिया निजात्मदृष्टी। स्वपत्नी भोगितां नरककोटी । निजात्मदृष्टीच्या संतुष्टीं । द्वंद्व सहज लोटीं ममाज्ञा ॥१६॥ श्रीरामाचे अनुवादन । ऐकतां साच विस्मयापन्न। तारासुग्रीवां समाधान । श्रीरामवचन अनुल्लंघ्य ॥१७॥ सुग्रीव किष्किंधेचा राजा । तारा त्याची निजभाजा । यौवराज्य तारात्मजा। श्रीरघुराजाची हेचि आज्ञा।॥१८॥ ऐसें बोलतां श्रीरामचंद्र । अवघीं केला जयजयकार । संतोषले वानरभार। आणि सुरवर समस्त ॥१९॥ हा महोत्सव किष्किंधेत । वानर मिळवोनियां समस्त । ऋषी आणिले असंख्यात। अभिषेकार्थ सुग्रीवा ॥१२०॥ सनख[5] व्याघ्रचर्म समग्र। वराहदंष्ट्रा कूर्मचक्र[6]। सप्तसमुद्रींचें नीर। आणिलें क्षीर सुरभीचें ॥२१॥ सप्तमृत्तिका तीर्थोदकें । स्थळजें[7] जळजें[8] कमळें अनेकें। सुमनें चंदनें अति चोखें। क्षीरोदकें मणिरत्नें॥२२॥ चूतपल्लव[9] पद्मपल्लव । अशोकपल्लवांची लवलव। नगर शृंगारिलें सर्व। अति अपूर्व हनुमंतें ॥२३॥ मुकुट कुंडलें अलंकार । श्वेत छत्र युग्मचामर । सदाफळी औंदुंबर । पीठ[10] पवित्र अभिषेका॥२४॥ शातकुंभ[11]। रजतकुंभ[12] । सालंकारी श्वेतवृषभ । रत्नीं पूर्ण रत्नकुंभ। हरिवल्लभ[13] अभिषेक ॥२५॥ होम करोनि प्रधान । सर्वेचि केलें द्विजपूजन। तिलाज्यधेनुविविधदान । अभिषिंचन सुग्रीवा ॥२६॥ जैसी उमा आणि रमा । तैसी शोभे तारा रुमा। अंगदाची कांता क्षमा । महा महिमा अभिषेकीं ॥२७॥ सुवासिक शीतळ गंधोदक । सुमनोदक कुशोदक । श्रीरामांचें चरणोदक । ऋषिअभिषेक वेदघोषीं ॥२८॥ वस्त्रें अलंकार धनधान्य । द्विजां दिधलें भोजन। अंगदा यौवराज्य देउन । सुखसंपन्न सुग्रीव ॥२९॥ विधियुक्त वेदमंत्र । अभिषेकिती ऋषीश्वर। अभिषेकावया आले वानर। थोर थोर तें ऐका ॥१३०॥

> गजो गवाक्षो गवयः शरभो गंधमादनः । मैंदद्विविदनीलाश्च सुषेणो जांबवान्नलः ।
> अभ्यषिंचंत सुग्रीवमंगदं चापि पूजयन् ॥१९॥

गज गवाक्ष गवय। शरभ गंधमादन उभय। मैंद द्विविद नीळ पाहें । आलें लवलाहें अभिषेका ॥३१॥ नळ सुषेण जांबवंत सबळ। आणिक वानर बहुत प्रबळ। सुग्रीव अभिषेकावया सकळ । आले तत्काळ वानर ॥३२॥ अभिषेकिती सुग्रीवासी । यौवराज्य अंगदासी । पूजा करोनि दोघांसी । अति उल्लासीं स्थापिलें ॥३३॥ अंगदा यौवराज्य दिधलें। वानरींहीं सुग्रीवा संमानिलें । अवघे म्हणती भलें केलें । संस्थापिलें सुग्रीवा श्रीरामें ॥३४॥

> एतस्मिन्नंतरे छत्रं गृहीत्वा पनसो मुदा । यूथपौ नलतारौ च वालव्यजनधारिणौ ॥२०॥

श्रीरामांना सर्वांचे वंदन : पहिलें बसैवोनि सौमित्र। मग रथीं बैसें सुग्रीव वीर। पुढें घेवोनि अंगद कुमर । निघे सत्वर रामनमना ॥३५॥ ते समयी पनस वीर । सुग्रीवावरी धरी छत्र। कनकदंडीयुग्मचामर[14]। नळ तार वीर[15] वीजिति ॥३६॥ यापरी सुग्रीव राज्यधर। घेवोनि वानरांचा संभार। करीत आले जयजयकार। तेणें रघुवीर सुखी जाला ॥३७॥ हैकार थैकार जयजयकार । करीत आले वानरवीर । तें देखोनि श्रीरामचंद्र । सुखनिर्भर[16] स्वानंदें ॥३८॥

---

शब्दार्थ : १. पती, २. दीरापासून पुत्रपाप्ती, ३. प्रमाण मानून, ४. स्त्री, ५. नखासहित, ६. कामधेनूचे, ७. भूमीवरील, ८. जळातील, ९. आंब्याचे डहाळे, १०. आसन, ११ सोन्याच्या घागरी, १२, रुप्याच्या घागरी, १३. वानरांचा प्रिय, १४. सोन्याची काठी असलेले, १५.वारतात, १६. सुखपूर्ण

रथ सांडोनि सत्वर । अंगद सुग्रीव सौमित्र । लोटांगणीं श्रीरामचंद्र । नमस्कारें वंदिला ॥३९॥

निवेद्य रामाय महात्मने तदा महाभिषेकं कपिवाहिनीपतिः ।
रुमां स्वभार्यामुपलभ्य वीर्यवान् । अवाप राज्यं त्रिदशाधिपो यथा ॥२१॥

हनुमंत सांगे श्रीरामापासी । राज्याभिषेक सुग्रीवासी । यौवराज्य देवोनि अंगदासी । पायांपासीं आणिलें ॥१४०॥ येथोनियां श्रीरघुनाथा । पुढील कार्यकर्तव्यता। विचारोनि सांगे आतां ।आम्हां समस्तां दासांसी ॥४१॥ पर्जन्यकाळचातुर्मासीं[१]। करितां न ये सीताशुद्धीसी[२]। सुग्रीवा धाडिजे किष्किंधेसी । हनुमंतासी राम सांगे ॥४२॥ प्रस्त्रवणगिरिगुहेसीं[३]। मी राहीन सौमित्रासीं। लोटलिया पर्जन्यकाळासी। सीताशुद्धीसी शीघ्र यावें ॥४३॥ सुग्रीव म्हणे श्रीरामासी । लोटलिया चातुर्मास्यासी। आणोनि वानरसैन्यासी। सीताशुद्धीसी मी करीन ॥४४॥ ऐसें बोलोनि आपण । वंदोनियां श्रीरामचरण । उल्लासोनि अवघे जण । किष्किंधापुर पावले ॥४५॥ श्रीरामें उद्धरिला वाळी। राज्यीं स्थापिला सुग्रीव बळी । कीर्ती जाली भूमंडळी । पिटिली टाळी तिहीं लोकीं ॥४६॥ आतां पुढें कथेसी। क्रमोनियां[४] चातुर्मास्यासी । सुग्रीव घेवोनि येईल वानरांसी। सीताशुद्धीसी करावया ॥४७॥ एकाजनार्दना शरण । जालें वाळीचें उद्धरण । वानरा सखा श्रीरघुनंदन । पशुपावन[५] श्रीराम ॥१४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सुग्रीवराज्याभिषेको नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥ ओंव्या ॥१४८॥ श्लोक ॥२१॥ एवं ॥१६९॥

## अध्याय आठवा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### सुग्रीवाचें आगमन

मागील अनुसंधान : श्रीरामें उद्धरिलें वाळीसी । राज्याभिषिंचन सुग्रीवासी । सुखी केलें स्वयें तारेसी। देवोनि अंगदासी यौवराज्य॥१॥ सुग्रीव राजा निजभ्रतार। युवराज निजकुमर । तारा तेणें सुखनिर्भर । श्रीरामचंद्रप्रसादें ॥२॥

अभिषेके तु सुग्रीवे प्रविष्टे वानरे गुहाम् । आजगाम सहभ्राता रामः प्रस्त्रवणं गिरिम् ॥१॥

प्रधान अंगदसमवेत। सुग्रीव गेला किष्किंधेंत । श्रीरामें वसविला माल्यवंत । गुहा प्रशस्त देखोनि ॥३॥

पावसाळा संपल्यावरही सुग्रीवाच्या उपेक्षेमुळे रामांचा क्रोध : माल्यवंतगिरिवरीं । प्रस्त्रवणगुहेभीतरीं । श्रीराम राहिला मास चारी । सवें साहाकारी सौमित्र ॥४॥ चारी मास पर्जन्यकाळ । श्रीराम राहिला सुनिश्चळ । श्रीरामकार्या उतावेळ । शरत्काल स्वयें आला ॥५॥ ग्रासोनि वर्षाकाळ[६] । शीघ्र पावला शरत्काळ । श्रीराम काळाचाही काळ । सुनिश्चळ स्वस्थानीं ॥६॥ जेवीं साधूंचें मानस । नित्य निर्मळ निर्दोष। मेघीं सांडिलें आकाश। स्वप्रकाश तेंवी भासे॥७॥ शारदी निर्मळता आकाशीं। प्रसन्नप्रभा शशिसूर्यांसी। तो सुखकाळ साधकांसी। पुरुषार्थांसी[७] साधावया ॥८॥ तीर्था निघाले तीर्थवासी । अभ्यासी बैसले अभ्यासासीं । राजे करिती प्रस्थानासी। अरिगवर्गांसी[८] जिंकावया॥९॥ काळ काळातें आकळित । काळा नाकळे श्रीरघुनाथ । तो बैसला असे गिरिगुहेंत । सीताशुद्ध्यर्थ नटनाट्यें[९] ॥१०॥ देखोनियां शरत्काळातें । श्रीराम म्हणे लक्ष्मणातें। सुग्रीव नयेचि कां येथें ।

शब्दार्थ : १. पावसाळ्याचे चार महिन्यांपर्यंत, २. सीतेचा शोध, ३. प्रस्त्रवणनामक पर्वताच्या गुहेमध्यें, ४. घालवून, ५. पशूंना पावन (पापक्त) करणारा. ६. पावसाळा, ७. धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चार पुरुषार्थाला, ८. शत्रूंचा, ९. सोंग घेऊन.

निजनियमातें विसरला ।।११।। जें रंगलें विषयस्वार्थीं । ते नव्हेति परमार्थी । त्यांसी दंडोनियां संतीं । हितकार्यार्थीं लावावें ।।१२।। जो अतिशयेंसीं विषयासक्त। तो कदा ना देखेचि परमार्थ। तो शुद्ध उपकारार्थ । येईल निश्चित हें न घडे ।।१३।।

चातुर्मास्ये गतेऽभ्येत्य सीतायाः परिमार्गणे । कृतार्थः समयं कृत्वा दुर्मतिर्नाभिमन्यते ।।२।।

क्रमिलिया चातुर्मास्यासी । शीघ्र यावें सीताशुद्धीसी । तेंही नाठवें सुग्रीवासी। जो मजपासीं नेम केला ।।१४।। किष्किंधे जावोनि आपण । सुग्रीवा द्यावी आठवण। जरी तो न मानी माझें वचन। विंधोनि बाण वधावा ।।१५।। तारा रुमा दोघी पत्नी। जो उन्मत्त मद्यपानीं । माझें वचन न गणी । तो तत्क्षणीं मारावा ।।१६।। ज्यासी नाहीं माझी आठवण । नाहीं मत्कर्माचें स्मरण । त्यासी मारावें आपण । विंधोनि बाण सौमित्रा ।।१७।। जेणें केलें वाळिनिर्दळण । तोचि सोडोनियां बाण। घ्यावा सुग्रीवाचा प्राण। अर्ध क्षण न लागतां ।।१८।। शठ नष्ट कृतघ्न वानर । नेणती उपकार प्रत्युपकार। मिथ्यावादी पालेखाइर । हा कुमित्र मित्रत्वा ।।१९।। तूं तंव माझा सुखा सौमित्र। सुग्रीव केवळ कुमित्र। त्याचें विचारोनि अभ्यंतर । मग संहार करावा ।।२०।।

श्रीरामवचन ऐकून लक्ष्मण क्रोधायमान व शस्त्रसज्ज होऊन त्याचे प्रयाण : ऐकोनि श्रीरामाचे वचन । करोनियां साष्टांग नमन । लक्ष्मण निघाला आपण । कोपायमान रामाज्ञें ।।२१।।

शक्रचापानिभं घोरं धनुः कालांतकोपमम् । प्रगृह्य गिरिशृंगाभं प्रययौ लक्ष्मणस्तदा ।।३।।

शालतालांश्च कर्णांश्च तरसा पातायन्दुमान् । शिलाश्च शकलीकुर्वन्पद्भ्यां गज इवाशुगः ।।४।।

लक्ष्मणाचा अति साटोप । इंद्रधनुष्यासमान चाप । हातीं घेवोनि सकोप । पदाक्षेप[1] अवधारा ।।२२।। सक्रोध पाद सबळ शक्ती । सायसादडे[2] नेणों किती । शाळ ताळ उन्मूळती। वृक्ष उपडती कर्णिकार ।।२३।। अति सक्रोध क्रोधानळीं । वज्रनिर्घातपादें[3] बळीं । शिळा पाषाण पायांतळीं । होत रांगोळी पदोपदीं ।।२४।।

हनुमंताची सुग्रीवाला पूर्वसूचना : पूर्वसूचना स्वयें हनुमंत। सुग्रीवासी असे सांगत। विसरलासी रामकार्यार्थ । अति उन्मत्त विषयांध ।।२५।। स्त्रीविषय मद्यपान । त्याहीवरी धन मान । त्याही वरी शब्दज्ञान। हेचि नागवण स्वहिताविषयीं ।।२६।। द्रव्य दारा मद्यपान। तुझें बुडालें स्वहितज्ञान। विसरलासी श्रीरामभजन । परम विघ्न तुज आलें ।।२७।। गेला काळ तूं नेणसी। आयुष्य वेंचलें विषयासीं। लोटलिया चातुर्मास्यासी। सीताशुद्धीसी न निघसीं ।।२८।। सीता शुद्धीसी न करितां। कोप येईल श्रीरघुनाथा। तो करील तुझिया घाता । सत्य सर्वथा सुग्रीवा ।।२९।।

हनुमंताची व्यवस्था व वानरांना पाचारण : ऐकोनि हनुमंताचे वचन । सुग्रीव नव्हेचि सावधान। वाक्य बोलिला उदासीन । अति गौण कार्यार्थ ।।३०।। सुग्रीव सांगे हनुमंतासी । शीघ्र मूळ धाडावे सैन्यासी। ऐसें सांगोनियां त्यासी। राव राणिवसासीं[4] निघाला ।।३१।। हनुमंतें येवोनि अति शीघ्र । दहा सहस्र वानरवीर । आणावया सेना सैन्यधर[5] । स्वयें सत्वर धाडिले ।।३२।।

लक्ष्मण किष्किंधेला जातो : येरीकडे सौमित्र। कोपें चालिला काळाग्नि रुद्र । त्यातें देखोनि वानरवीर । थोर थोर गजबजिलें ।।३३।। किष्किंधेची धरोनी वाट । पायें पाषाण करीत पीठ । लक्ष्मण येता हे उद्भट[6] । वानर समस्त हडबडिले ।।३४।।

दशनागबलाः केचित्केचिद्दशगुणोत्तराः । केचिन्नागसहस्रस्य बभूवुस्तुल्यवर्चसः ।।५।।

शतकोटिबलाः केचित्केचिद्वायुबलोपमाः । अप्रमेयबलाश्चान्ये तत्रासन्हरिपुंगवाः ।।६।।

**शब्दार्थ :** १. पावले टाकणे, २. सायसादडे नावाचे वृक्ष, ३. वज्राघातासमान पाय पडून, ४. अंतःपुरात, ५. सेनानायक, ६. बलाढ्य.

ततो भयपरीतांगाः क्रुद्धं दृष्ट्वां तु लक्ष्मणम् । कालमृत्युयुगान्ताभं शतशो दुद्रुवुस्तदा ॥७॥

एका दहा हस्तींचें बळ वानरा । एका त्यांहूनि दशोत्तरा[१] । एका नागबळसहस्रा । त्यास अपार असंख्य ॥३५॥ एकाचे अंगी विद्युल्लताबळ । एकाचें अंगी असंख्य बळ । एकएकाहूनि सबळ । तुळा अतुळ अप्रमेय ॥३६॥ ऐसे वानरांचे संभार । किष्किंधेमाजी अपार । नगर राखिती महावीर । अति दुर्धर बलिष्ठ ॥३७॥ लक्ष्मण शरचापधर । काळ कृतांत प्रळयरुद्र । त्यातें देखोनियां वानर । लहान थोर भयभीत ॥३८॥ देखोनि लक्ष्मणाचा यावा[२] । चळकाप वानरांच्या जीवा । कोणें कोणा धीर द्यावा । भय सर्वां समान ॥३९॥ लक्ष्मणें टणत्कारिलें सीत[३] । वानर उडाले समस्त । एक एकापुढें पळत । अति आकांत नगरामाजी ॥४०॥ एका मनुष्याची आली धाडी । तेणें पळती वानरकोडी । राजगृहीं हडबड गाढी । वानरें बापुडीं किलकिलती ॥४१॥ वानर बोलती विकडीं[४]। वाळिप्रतापख्याती गाढी। तो मरतांचि आली धाडी । काढाकाढी कोण करी ॥४२॥ तारा सुग्रीवासी सांगत । नगरीं होतो अति आकांत। अझूनि काय कामासक्त । होईं सावचित्त उन्मत्ता ॥४३॥ प्रधान सांगती रायासी। सीताशुद्धिमर्यादेसी । तूं जावया चुकलासी । श्रीराम आवेशीं क्षोभला ॥४४॥ तुझा करावया घात। श्रीरामें लक्ष्मण धाडिला येथ। वानर पळाले समस्त। अति आकांत नगरामाजी ॥४५॥ समयों चुकलों आपण। सत्य कोपला श्रीरघुनंदन । लक्ष्मणासी अनन्य शरण। रिघों आपण सकळही ॥४६॥

तं दृष्ट्वा क्रोधरक्ताक्षं सुगृहीतशरासनम् । सुग्रीवः सहसोत्तस्थौ कृतांजलिपुटस्तदा ॥८॥
तस्य तारा रुमा चैव द्वे भार्ये पुरतः स्थिते । कृतांजलिपुटे भूत्वा लक्ष्मणाभिमुखे तदा ॥९॥

धनुष्याचा वाहोनि गुण। सीतीं सज्जोनियां बाण । लक्ष्मण सक्रोधलोचन। सुग्रीव देखोन भयभीत ॥४७॥

तारा, रुमा व सुग्रीव विनंती करितात : तारा रुमा दोघी पत्नी। पुढें बद्धांजलि[५] करोनी। सुग्रीव आला लोटांगणीं । कर जोडोनि राहिला ॥४८॥ सुग्रीव म्हणे मी अपराधी । रामबाणें होय वधी[६]। लक्ष्मणां तूं कृपानिधी। मज त्रिशुद्धीं[७] वांचवावें॥४९॥ सुग्रीव येतां काकुळती । वांचवावया निजपती। तारा करीतसे विनंती । सत्वयुक्तीं दीनवचनें॥५०॥ लटिका तरी शरणागत । याचा करूं नये घात । मारिल्या अपकीर्ती जगांत । श्रीरघुनाथ पावेल ॥५१॥ सुग्रीव शरणागत जाला। श्रीरामें राज्यीं स्थापिला । तोचि श्रीरामें मारिला । स्वकीर्ती केला शिरच्छेद ॥५२॥ शरणागतवज्रपंजर । सूर्यवंशींचा हा वडिवार[८]। तेथें मारिलिया वानर। वंशीं श्रीरघुवीर अपकीर्ती ॥५३॥ वाळी वधिला अवचितां । हे अपकीर्ती श्रीरघुनाथा। सुग्रीव मारिल्या आता। दुसरी माथां अपकीर्ती॥५४॥ बाळक अंकावरी मुतलें। बापें धुतलें कीं मारिलें । तैसें शरणागत आपुलें। वांचवीं वहिलें सौमित्रा॥५५॥ तुझें नाम सौमित्र। वधितां शरणागत वानर। सौमित्रा होसी तूं कुमित्र। नाम अपवित्र होऊं नेदीं ॥५६॥ वांचवीं सुग्रीवाचा प्राण । वांचवीं आमचें अहेवपण[९]। तारा रुमा दोघी धांवोन । धरिले चरण मस्तकीं ॥५७॥ ऐकोनि तारेच्या सद्युक्ती। लक्ष्मण सुखावला चित्तीं। सुग्रीव महापापमूर्ती। ऐक तुजप्रती सांगेन॥५८॥असत्यवादें[१०] अधोगती । तेंही असत्य श्रीरामाप्रती। अनुवादलासी[११] पापमूर्ती । ऐक शास्त्रार्थी निर्णयो ॥५९॥

पंच स्वार्थानृतं हंति दश हंति गवानृतम् । शतमश्वानृते हंति सहस्रं पुरुषानृते ॥१०॥
हंति जातानजातांश्च हिरण्यार्थेऽनृतं वदन् । सर्वं भूम्यनृतं हन्ति मा स्म भूम्यनृतं वदः ॥११॥

शब्दार्थ : १. दसपटीने, २. आगमन, ३. धनुष्याची दोरी, ४. भयभीत होऊन, ५. हात जोडून, ६. वध करण्यास योग्य, ७. खरोखर, ८. मोठेपणा, ९. सौभाग्य, १०. खोटे बोलण्याने, ११. बोललासी.

आत्मानं स्वजनं हंति पुरुष: पुरुषानृते। पूर्व कृतार्थो मित्राणां न तत्प्रतिकरोति य: ।
कृतघ्न: सर्वभूतानां स वध्य: पुरुषाधम: ॥१२॥

आपस्वार्थी[1] असत्य वदती । पंच पूर्वज नरकीं जातीं । असत्य वदलिया गोस्वार्थी । नरका जाती दशपूर्वज ॥६०॥ अश्वार्थीं असत्य वदती । शत पूर्वज नरका जाती । सहस्र पूर्वजां अधोगती । जे मिथ्या बोलती पुरुषार्थ ॥६१॥ जे द्रव्यार्थीं असत्या वदती । त्याचेनि जितां मेल्या अधोगती । सकळ कुळ नरका नेती । जे असत्य वदती भूम्यर्थ ॥६२॥ येवोनि सत्पुरुषाप्रती। निश्चय कर्तव्यार्थ बोलती । तोचि नेमू न करिती । त्यांची दुर्गती अवधारीं ॥६३॥ सकलकुलस्वजनयुक्त । ते पावती निजात्मघात । मेल्यामागें नरक प्राप्त । त्यांसी निश्चितार्थ शास्त्र हें ॥६४॥ मित्रापासूनि स्वकार्य करूनि घेती । मित्रकार्य स्वयें न करिती । तंव ते वधावे सर्वभूतीं । नेमू शास्त्रार्थी ब्रह्मवाक्य ॥६५॥ परोपकारी सर्वकार्यार्थीं । ते वंदावे सर्व भूतीं । जे वंचक मित्रकार्यार्थीं । ते सर्व भूतीं निरसावे ॥६६॥ असतां घराश्रममढी। लटिका दोष लावोनि दुसरियांते पीडी। त्याच्या नरकाची परवडी । संख्या कोण करील ॥६७॥ त्यासी सर्प स्वयें डंखिती। व्याघ्र ऋक्ष[2] वृक[3] स्वयें भक्षिती। धर्मनियामक त्यासी विंधिती । वध्य होती सर्वांसी ॥६८॥

तारेची प्रार्थना व सुग्रीवाची शरणागती : ऐकोनि लक्ष्मणाची युक्ती । तारा विनवीतसे पुढती । सुग्रीव पापी होय निश्चितीं । पापनिर्मुक्ती तुझेनि ॥६९॥ करिता श्रीरामनामस्मरण । सकळ पापां होय दहन। तो देखिल्या रघुनंदन। पाप निर्दळण सत्संगें ॥७०॥ आवडीं करितां रामगोष्टी । पापें जळती कल्पकोटी। श्रीराम देखिल्या निजदृष्टीं। निष्पाप सृष्टीं श्रीरामें ॥७१॥ रामनामप्रतापशक्ती । पायां लागती चारी मुक्ती । नाम ब्रह्मादिक वंदिती । पापनिर्मुक्ती श्रीरामनामें ॥७२॥ तारावाक्य नाममहिमान । तेणें सौमित्रा प्रेम पूर्ण । तारेने धरिले दोनी चरण। पतिदान मज द्यावें॥७३॥ तारसौमित्रसंभाषण। ऐकोनि सुग्रीवा आलें रुदन। श्रीरामसेवा चुकलों जाण। वध्य संपूर्ण मी होय ॥७४॥ लागल्या श्रीरामाचा बाण। तत्काळ जाईल माझा प्राण । सौमित्रा तुज मी अनन्य शरण। जीवदान मज द्यावें ॥७५॥

भ्रातृव्यसनसंतप्तं दृष्ट्वा दशरथात्मजम् । सौवर्णमासनं हित्वा नत्वा तच्चरणांबुजम् ॥१३॥

सांडोनि हेमसिंहासन । सांडोनि राज्यसन्मान । सांडोनियां राज्याभिमान । वंदिले चरण लक्ष्मणाचें ॥७६॥

कृतघ्नाची निंदा, महापातकांहूनही अधम : सीताशुद्धिकार्याकारण । श्रीरामाज्ञेस्तव जाण । कोपोनिया लक्ष्मण । काय आपण बोलत ॥७७॥ कामचारिया[4] स्त्रीलंपटा । स्वकार्यवादिया महाशठा । श्रीरामकार्या परिभ्रष्टा । आतिपापिष्ठा तूं ऐक ॥७८॥

ब्रह्मघ्ने च सुरापे च चौरे भग्नवते तथा । निष्कृतिर्विहिता लोके कृतघ्ने नास्ति निष्कृति: ॥१४॥

सुरापानी[5] ब्रह्मघाती[6]। असे यासी प्रायश्चित्त शास्त्रार्थी । चोर शठक भग्नव्रतीं । त्यांसीही निष्कृति[7] शास्त्रीं असे ॥७९॥ मित्रोपकारा जो कृतघ्न । त्यासी निष्कृति नाहीं जाण । तुवां चाळविला रघुनंदन । पापी संपूर्ण तूं एक ॥८०॥

मारुतीची मध्यस्थी व लक्ष्मणाचा संतोष : कठिण बोलतां लक्ष्मण। तारा सुग्रीव अति उद्विग्न । ऐसें संकट अवलोकोन। वायुनंदन[8] तेथें आला ॥८१॥ सीताशुद्धीचा कार्यार्थ। सांडोनि ठकिला[9] श्रीरघुनाथ। यालागीं रामें करविला घात । महापापी तूं कृतघ्न॥८२॥ साधावया उभयकार्यार्थ। उचित बोले हनुमंत। न करोनि सुग्रीवाचा घात । रामकार्यार्थ साधावा॥८३॥ सेवा चुकल्या श्रीरघुनाथा। कोटि अपराध याचे माथां। क्षमा करोनि

शब्दार्थ : १. आपमतलबी, २. आस्वले, ३. लांडगे, ४. मनास वाटेल तसे वागणाऱ्या, ५. दारू पिणारा, ६. ब्राह्मणास मारणारा, ७. प्रायश्चित, ८. मारुती, ९. फसविला.

शरणागता । रामकार्यार्था साधणें ॥८४॥ आणावया वानरसैन्यासी । दूत धाडिले देशोदेशी । क्षमा करोनि सुग्रीवासी । रामकार्यासी साधावें ॥८५॥ ऐकोनि हनुमंताचें वचन । सौमित्र झाला सुखसंपन्न । तेव्हां सुग्रीव संतोषोन । केलें नमन आल्हादें ॥८६॥

प्रणम्य लक्ष्मणं राजा सुग्रीवस्त्विदमब्रवीत् । सर्व एव यतिष्यामो यद्रामस्य चिकीर्षितम् ॥१५॥

सीताशुद्धि रामकार्यार्था। अति आल्हाद वानरनाथा। सौमित्रचरणीं ठेवोनि माथा। होय बोलता सुग्रीव ॥८७॥ सेना यूथप[1] सैन्य प्रधान । अंगदासहित आपण। श्रीरामसेवेसी विकिला प्राण । सत्य जाण सौमित्रा ॥८८॥ श्रीरामाचें मनोगत । सिद्धि पाववीन समस्त । सैन्य आणावया येथ। दूत त्वरित धाडिले॥८९॥ माझे सेनानी सैन्यसंभार। रणकर्कश अति झुंजार। आतुर्बळी येती वानर । दूत सत्वर धाडिले ॥९०॥

**लक्ष्मणाचा सन्मान व त्याचे रामांकडे परतणे :** अर्घ्यपाद्यादि चंदन। धूपदीप माळा सुमन। करोनी लक्ष्मणाचें पूजन । केलें नमन सुग्रीवें ॥९१॥ सौमित्र म्हणे सुग्रीवासी । शीघ्र निघावें रामापासीं । एकाकी मी सांडोनि त्यासी । येथें आम्हांसी राहों नये ॥९२॥ ऐकोनि सौमित्राचें वचन । उभे अवघे करोनि प्रधान । सुग्रीवे वाहियला पण । अति निर्वाण तो ऐका ॥९३॥

**कार्यपूर्ती करण्यापूर्वी परत येईल त्यास दंड :** जो परतेल किष्किंधावनीं। तो दंडीन रासभारोहणीं[2]। तारा रुमा पाहे परतोनी। तो मातृगमनी महापापी ॥९४॥ सीताशुद्धी साध्य न होतां । श्रीराम सुखी न करितां। जो परतेल मागुता । तो दंडिजे पालथा तप्ततैलीं॥९५॥

**सर्वांचे रामांना नमन :** ऐसें सुग्रीवें नेमून। निशाणें[3] त्राहाटिलीं[4] गर्जोन। रथशिबिका संजोगून। तत्क्षणीं निघाले ॥९६॥ अंगद सौमित्र सुग्रीव वीर। रथीं चढले महाशूर। वालव्यजन[5] श्वेतातपत्र[6] । धरिले छत्र रायासीं ॥९७॥ जाला वाद्यांचा एक गजर । भाट गर्जती गंभीर । वानर वीरांचा संभार । अति सत्वर चालिला ॥९८॥ माल्यवंतपर्वतामाझारीं । प्रस्त्रवणगिरिशिखरीं । राम मणिमय शिळेवरी । गुहाद्वारीं उपविष्ट ॥९९॥ श्रीरामा देखोनि वानर । अवघीं केला जयजयकार। अंगद सौमित्र सुग्रीव वीर। केला नमस्कार साष्टांगीं ॥१००॥

**वानरसैन्याचा प्रचंड मेळावा :** अजानुबाहु पसरोन । श्रीरामें दिधलें आलिंगन। सुग्रीव पावोनि समाधान। काय गर्जोन बोलत ॥१॥ दूत धाडिले सत्वर । यूतयूथप[7] महावीर। वानरसेना सैन्यसंभार । अति सत्वर येताती ॥२॥

एतस्मिन्नंतरे घोरं वानराणां महाबलम् । उत्पपात महावीरं चालयन्वसुधातलम् ॥१६॥

ततो नागेंद्रसकाशैस्तीक्ष्णदंष्ट्रमहाबलैः । बभूवुर्वानरैर्घोरोर्दिशः सर्वाः समावृताः॥१७॥

ऐसें बोलतां महावीर । वानरसेनासंभार । येवों सरले अपार । धरा समग्र व्यापोनि ॥३॥ वानरसेना अतिप्रबळ । रितें न दिसे क्षितितळ । व्यापोनियां कुलाचळ । गोळांगूळ पैं आले ॥४॥ एक वानर पर्वताकार । एक वानरांमाजी गजेंद्र[8]। तीक्ष्णनखें दंष्ट्रा क्रूर । अति दुर्धर युद्धार्थी ॥५॥ मारितां पुच्छांचा पैंसांट[9]। शत सहस्रां होय आट । नखें पर्वता करिती पीठ । दांतीं तिखट वीर मारिती॥६॥ पूर्वे वानरांचे थाट। पश्चिमे दाटले घनदाट। उत्तरदक्षिणे वानरश्रेष्ठ । वीर उद्भट कोंदले ॥७॥ आग्नेय वायव्य नैर्ऋत्य। वानर कोंदले अमित । ईशान्य दिशेचा प्रांत । किळकिळीच वानरीं ॥८॥ वानरीं व्याप्त नभःस्थळ। वानरीं व्याप्त भूमंडळ। वानरीं व्यापिले सकळ । कुलाचळ पर्वत ॥९॥ एक ते अंजनाभ[10] काळे । एक ते पीतवर्ण पिंवळे । एक ते गौरवण सोनसळे । एक ते निळे सुनीळ ॥११०॥ सिंदूररक्त वानरगण। एक ते विद्युत्प्राय पूर्ण। एक ते शुद्ध शुभ्रवर्ण । धूम्रवर्ण पैं एक ॥११॥ एक ते भुरकट वानर। एक

शब्दार्थ : १. सेनापती, २. गाढवावर बसून, ३. वाद्ये, ४. वाजविली, ५. चवऱ्या, ६. शुभ्रछत्र, ७. कळपांचे नायक, ८. श्रेष्ठ, ९. सपाटा, १०. काजळासारखे.

ते दाळिंबीसुमनाकार। एक ते पेरीजाचे[1] डोंगर। अभ्रशरीर पै एक॥१२॥ एक चंद्रप्राय चोखडे। एक कुंकुमांकित तांबडे । सलोमलोमीं रीस गाढे । सैन्यापुढे गुणगुणिती ॥१३॥ होतां श्रीरामदर्शन । रिसां रामनामगुणगुण । वानर करिती रामस्मरण । नामें त्रिभुवन कोंदलें ॥१४॥ देखतां श्रीरामाची मूर्ती । पालटल्या चित्तवृत्ती। वानरां आवडे श्रीरामभक्ती । नाम स्मरती अहर्निशीं॥१५॥ बाप सत्संगाचा महिमा। पशु विनटले रामनामा। श्रीरामभक्ति प्लवंगमां[2]। तिहीं हनुमान गुरु केला ॥१६॥ श्रीरामनामाचा गजर । वानरीं केला भुभुःकार। श्रीरामचंद्र सुखसागर। आणि सौमित्र आल्हादे ॥१७॥ स्वयें श्रीरामें अति उल्लासीं। सुग्रीवा धरिलें पोटासीं। सत्य सखा माझा होसी । दृढविश्वासी कार्यकरिता ॥८॥ सौमित्र पुसे सुग्रीवासी। मर्यादा न दिसे वानरांसी। त्यांची संख्या आहे कैसी। तेचि श्रीरामापांसी सांगावी ॥१९॥

स्वैः स्वैः परिवृताः सैन्यैः सर्वे तिष्ठंति राघव । शतैः शतसहस्त्रैश्च वर्तंते कोटिभिस्तथा ॥१८॥
अयुतैरागमिष्यंति शंकुमिश्च परंतप । अर्बुदैरर्बुदशतैर्मध्यैरंत्यैश्च वानराः ॥१९॥

श्रीरामा तुझी प्रतापप्रौढी । सैन्यें आलीं तंव हीं थोडीं। पुढे येतील कल्पकोडी। संख्यापरवडी असंख्य॥१२०॥ अर्बुद[3] निर्बुद[4] हें अल्पक। शंक[5] महाशंखाहूनि अधिक। सैन्य मिळालें असंख्य । करितां शंख नव्हे संख्या ॥२१॥ समुद्राचे थोडे खडे । इतुकें सैन्य मिळेल पुढें । रावण कायसें बापुडें । आणीन रोकडें बांधोनी ॥२२॥ ऐसें बोलोनीयां पाहें । सुग्रीवें आफळिली[6] बाहे[7] । शिवोनी श्रीरामाचे पाये । करील काय तें ऐका ॥२३॥ रणीं राक्षसां रवंदळी । करीन लंकेची पै होळी । त्रिकूट उपटोनि समूळीं । जनकबाळी आणीन ॥२४॥ वधोनियां लंकानाथा। स्वयें आणोनिया सीता । सुखी करीन श्रीरघुनाथा । होय गर्जता आल्हादें ॥२५॥ ऐकोनि सुग्रीवाची मात । संतोषोनि श्रीरघुनाथ । सुग्रीवास कडिये घेत । स्वयें नाचत स्वानंदे ॥२६॥ जैसी आणोनि दिधली सीता । तैसें सुख झालें श्रीरघुनाथा। उचलोनियां निजभक्ता । होय नाचता श्रीराम ॥२७॥ वानरीं केला भुभुःकार । ऋषी करिती जयजयकार । सुमनें वर्षती सुरवर । सुखनिर्भर श्रीराम ॥२८॥ सुग्रीव रामें उचलितां । सुखें विसरला देव भक्ता । मीतूंपण नाठवे रघुनाथा। भक्तप्रेमता निजऐक्य ॥२९॥ एकाजर्नादना शरण । देवभक्तां ऐक्य पूर्ण । खुंटला बोल तुटलें मौन । सुखैकघन श्रीराम ॥१३०॥ सुख द्यावया सर्वांसी। श्रीराम आला वनवासासी। तेणें सुखी केलें सुग्रीवासी । निजसमरसीं निजांगें ॥३१॥ स्तस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सुग्रीवागमनं नाम अष्टमोध्यायः॥८॥ ओंव्या ॥१३१॥ श्लोक ॥१९॥ एवं॥१५०॥

## अध्याय नववा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### वानरसेनेला श्रीरामदर्शन

**सुग्रीव श्रीरामांना वानरसेनेचा विस्तार समजावून सांगतो :** सुग्रीवें विनविला रघुवीर । सैन्य सेनानी सेनाधर । सैन्ययूथपाळ महावीर। नमस्कार करूं पाहती ॥१॥ स्वामि समवेत सौमित्र। पहावा वानरांचा संभार । ऐकोनि सुग्रीवांचे उत्तर। जाला सादर श्रीराम ॥२॥

यूथपा दशसाहस्त्रं वृता वानरकोटिभिः । वानयैः पार्वतीयैश्च सामुद्रैश्च महाबलैः ॥१॥

माझे कटकीं दहा सहस्र । सेनानायक सेनाधर। एकएकातळीं कोटि कोटि वीर । अति

शब्दार्थ : १. वैदुर्य नावाचे रत्न, २. वानरांना, ३. दशकोटी, ४. शतकोटी, ५. शकुसंख्याक, ६. मुंडा ठोकला.

दुर्धर रणयोद्धे ॥३॥ उदयास्तगिरिपर्यंत । वानर आले जी समस्त । नंदनवनींचे वीर विख्यात। आले त्वरित रामकार्या ॥४॥ सप्तारण्य सप्तसमुद्र । नदीस्रोत वनें उखर[१] । तेथोनियां वानरवीर । आले सत्वर रामकार्या ॥५॥ मेरु मंदार आणि विंध्याद्री । वेंकटाद्रि आणि सह्याद्री। तेथोनि यावा[२] केला वानरीं। निजगजरीं रामकार्या॥६॥ हिमाचळ अर्बुदाचळ। गंधमादन आणि श्रीशैल । पर्वतीं वानर सकळ। आले तत्काळ रामकार्या॥७॥ घेवोनि आपुलाला भार । पृथक् करूं येती नमस्कार। स्वामीनें पहावे सादर। वानरवीर रणयोद्धे ॥८॥ शतबळीनामा वानर । सेना दशकोटिसहस्र । घेवोनियां वानरभार । केला नमस्कार श्रीरामा ॥९॥ हनुमंताचा पिता सावत्र । केसरिनामा महावीर । सेना कोट्यनुकोटि वानर। केला नमस्कार श्रीरामा ॥१०॥ वानराचे जातीआंतौता[३]। केसरी अंजनीचा निजभर्ता । तो हनुमंताचा क्षेत्रजपिता[४]। येणें ग्रंथार्था सत्यत्व ॥११॥ हनुमंत वायूचा वीर्यज सुतु । केसरी क्षेत्रत्वें पितु । दोहीं बापाचा हनुमंतु । सत्य ग्रंथु वाल्मिकी॥१२॥ नळ वीरु दहनदीप्त । बालसूर्यासम आरक्त । वानरसेना अयुतायुत[५]। वेगें श्रीरघुनाथ वंदिला॥१३॥ गोळांगूळ[६] असंख्यात । कोट्यनुकोटि लक्षानुलक्ष । घेवोनि आला गवाक्ष। श्रीराम संमुख वंदिला ॥१४॥ अभ्रवर्ण अति दुर्धर। धूम्रनामा महावीर। घेवोनि सेना शतसहस्र । केला नमस्कार श्रीरामा ॥१५॥ पनस वानर दुर्धर । पर्वतोपम महावीर। दशकोटि सहपरिवार। केला नमस्कार श्रीरामा॥१६॥ मैंद द्विविद दोनी वीर। एका सप्तकोटि परिवार । एका अष्टकोटि वानर । केला नमस्कार श्रीरामा ॥१७॥ वीर वानर गंधमादन । साठी कोटि वानरसैन्य । घेवोनि आला आपण । केलें नमन श्रीरामा ॥१८॥ तार[७] तेजाचा घडिला । कीं चंद्रबिंबाचा ओतिला । तैसा तारवानर शोभला । श्रीरामें देखिला तेजस्वी ॥१९॥ ऐसा तार महावीर । सवें शतकोटि वानरभार। घेवोनि आला सत्वर। केला नमस्कार श्रीरामा ॥२०॥ गाळोनि व्योमींची[८] नीळिमा। ओतिली नळाची प्रतिमा । सुनीळशोभा प्लवंगमा[९]। जो कां श्रीरामा पढियंता[१०] ॥२१॥ सेतुबंधाची अनुवृत्ती[११]। याचेनि हातें शिळा तरती। हें जाणोनि श्रीरघुपती। करी अति प्रीती नळासीं ॥२२॥ नामें नील वर्णे नीळ । कांस घातली सुनीळ । शतसहस्रकोटि दळ । घेवोनि तत्काळ तो आला ॥२३॥ सुग्रीवदळाचा दळपती । नीळ दुर्धरप्रतापशक्ती । तेणें येवोनि विनीतवृत्ती । श्रीरघुपती वंदिला ॥२४॥ दधिमुख दुराधर्ष दोनी । अकरा कोटि सेना घेवोनी। श्रीरामातें अभिवंदोनी । कर जोडूनी राहिले ॥२५॥ तरु तरळ कुमुद कुमुदाक्ष। गज शरभ गवय गवाक्ष। महाहनु इत्यादि प्रमुख। यूथप असंख्य पाहों श्रीरामा॥२६॥ तारेचा पिता वाळीचा श्वशुर। सुषेण वैद्यराज वानर। दहा अयुतें वानरभार। केला नमस्कार श्रीरामा ॥२७॥ जांबवंताचा ज्येष्ठ बंधु । नामें धूम्र पैं अगाधु । रीससैन्यासीं[१२] सन्नद्धु[१३]। आला साधूं रामाकार्या ॥२८॥ जांबवंत वरि प्रबळ। बाहत्तर कोटि रीस सबळ। घेवोनयां निजदळ। आला तत्काळ निजगजरें॥२९॥ जांबवंत आपण । नित्य करितां रामस्मरण। तेचि अस्वलांसी गुणगुण । अनुदिन अहर्निशी ॥३०॥ रामनामाची गुणगुण । तेणें कोंदलें त्रिभुवन । महीजीवन पावन । नामें गगन कोंदलें ॥३१॥ देखोनियां जांबवंत वीर। श्रीरामसौमित्रां आल्हाद थोर । त्यासी स्वयें श्रीरामचंद्र । पुसे विचार निजविजया॥३२॥ नामापासीं नित्य कीर्ती। नामापासीं नित्य शांति । नामापासीं विजयवृत्ति। भवनिर्मुक्ति रामनामें ॥३३॥ ऐसें जाणोनि श्रीरघुनाथ । आप्त मानी जांबवंत। त्यांसी करोनि नित्य एकांत । निजविजयार्थ साधावया

---

शब्दार्थ : १. माळवट जमीन, २. आगमन, ३. जातीमध्ये , ४. वास्तविक पिता. स्मृतिग्रंथांतून निरनिराळ्या प्रकारचे पुत्र दिलेले आहेत. औरस, क्षेत्रज वगैरे. इतर त्यांपैकी उरसा जातः औरसः (अत एव) सुतः, क्षेत्र म्हणजे माता, तींत झाला म्हणून क्षेत्रज, ५. अयुत- दशसहस्र, ६. वानर, ७. शुभ्र तंतू, धागा, ८. आकाशसंबंधी ९. प्लवंगमा (प्लव=उड्या मारून चालणारा) वानराला, १०. आवडता, ११. रचना, १२. अस्वलसैन्य घेऊन, १३. तयार .

॥३४॥ ऐसे वानरांचे भार । श्रीरामें देखिले अपार। तंव जाला अति गजर। तुरें अपार लागलीं ॥३५॥

ततः पद्मसहस्रेण वृत्तः शंखशतेन च । युवराजोऽगदः प्राप्तः पितृतुल्यपराक्रमः ॥२॥

निशाणें त्राहाटिली लवलाहीं ! ढोल टिमक्या बुरंगें पाहीं। गिडिबिडिती ठायींच्या ठायीं । विराणीं पाहीं वाजती ॥३६॥ काहळा आणि रणकाहळा । शंख त्राहाटिला भूगोळा। महागजर भेरींचा जाला । अंगद झाला युवराजा ॥३७॥ तडक फुटले एकसरें। वोडणें[1] भिंडिमाळांचे[2] पागोरे[3]। खाखाइलीं रणतुरें । भुभुःकारें गिरि गर्जे ॥३८॥ पद्म महापद्म जाणा । शंखशब्दे असंख्यगणना । अंगदाची वानरसेना। आंगवण दाटुगी ॥३९॥ वृक्ष उन्मूळिले सहसुमनां । श्वेत पीत केतक वानरसेना । शालतालवृक्षकर्दळीपाना। ध्वजा संपूर्णा शोभती ॥४०॥ किंशुक[4] फुलले आरक्त। अगस्तिवृक्षीं सुमने श्वेत । कांचन फुलले श्वेत पीत । तेणें सैन्यांत अति शोभा ॥४१॥ ऐसा निजसेनासंभार । त्यामाजी अंगद राजकुमर। युवराज मनोहर । श्वेतच्छत्र रत्नांक ॥४२॥ कनकदंडयुग्मचारी। आरूढला रथावरी। ध्वजीं मुक्ताफळें झालरी । जयजयकारीं चालिला ॥४३॥ हैकार थैकार जैकार । तळपत चमकत चमत्कार । वृक्ष झेलिती अपार । देती वानर किराणें[5] ॥४४॥ वानरवीर अति सावध । शालतालशिळायुद्ध । महावीर पैं उन्नद्ध । सन्नद्ध बद्ध दळभार ॥४५॥ रथ लोटिले घडघडाट। वानरसेनेचा पैं थाट । वीर चालिले उद्भट। कडकडाट सैन्याचा ॥४६॥ वाजंत्रांचा नाद गंभीर । वानरीं केला भुभुःकार । दुर्धरसेनानिजसंभार। अंगद वीर पैं आला ॥४७॥ वाळिवळें सबळबळ । अंगद आला समदळ । वीर पुरुषार्थी प्रबळ । दुर्धर मेळ युद्धाचा ॥४८॥

सुग्रीव व अंगदाचे स्वागतः देखोनि अंगदाचा यावा[6]। सुख जालें श्रीराघवा । सुख सुग्रीवाच्या जीवा । सुख सर्वां सुरनरां ॥४९॥ अंगदें सांडोनियां रथा । श्रीरामचरणीं ठेविला माथा । श्रीरघुनाथही उल्लासता[7] । होय आलिंगिता अंगदासी ॥५०॥

अंगदाकडून सुग्रीवाची स्तुती : चुंबोनि अंगदाचें वदन। श्रीरामें दिधलें आलिंगन । तेणें त्यासी समाधान । सुखसंपन्न श्रीरामें ॥५१॥ केलें सुग्रीवासी नमन । सुग्रीवें दिधलें आलिंगन । अंगदें सुग्रीवा समाधान । सुखसंपन्न श्रीरामें ॥५२॥ सुग्रीवे करविलें वाळिघाता। हा द्वेष नाठवे अंगदाचे चित्ता । श्रीरामें उद्धरिला माझा पिता । त्यासी मुख्य कर्ता सुग्रीव ॥५३॥ वाळिजन्मशतांच्या कोडी । सुग्रीवें तोडविली ते बेडी । श्रीरामसुखाची निजगुढी[8]। उभविली रोकडी वाळीनें ॥५४॥ आम्ही पावलो श्रीरघुनाथा । हाही सुग्रीवधर्म तत्वतां । पित्याहूनि अधिक चुलता । आम्हां समस्तां उद्धरिलें॥५५॥ ज्याचेनि पाविजे परमार्था। तोचि माझा सखा पिता । सुग्रीवाहूनि परता । सखा सर्वथा मज नाहीं ॥५६॥ सुग्रीवें वंश उद्धरिला । सुग्रीव वानरसुखा अवतरला । पुढती सुग्रीवाच्या चरणा लागला । अंगदा जाला वंदिता ॥५७॥ ऐकोनि अंगदाचें वचन । सुग्रीवासी आलें रुदन । अंगद वंशासीं सुखनिधान। मी सुखसंपन्न अंगदें ॥५८॥ ऐसे सुग्रीव बोलोन। अंगदासी दिधलें आलिंगन। सभेद द्वेष गेला विरोन । सुखसंपन्न श्रीरामें ॥५९॥

वानरांचा उल्हास व लीला, रामांचा उपहास : देखोनि अंगदाचा दळभारू[9] । नळनीळादि प्रधान वानरू । अवघीं केला जयजयकारू । श्रीरामचंद्र वंदिला ॥६०॥ एक फळ ठेविती श्रीरामापुढें । एक वानर घेवोनि तें उडे । संमुख बैसोनि रामापुढें । खाती निवाडें विटंबिती[10] ॥६१॥ वांकुल्या दाविती रामापुढें । डोळे मिचकाविती लक्ष्मणापुढें । सुग्रीवा घुलकाविती रोकडें । नाचें उडती किळकिळित ॥६२॥ श्रीरामें हारवोनि सीता । ऐसा ऐसा रडत होता।

शब्दार्थ : १. ढाला, २. गोफिणीचे, ३. दोऱ्या, ४. पळस, ५. उड्या, ६. आगमन, ७. उल्हासाने, ८. मोठी पताका, ९. सैन्यसमुदाय, १०. वेडावीत राहिले.

उकसाबुकसीं होय स्फुंदता । पडे मूर्च्छित सीते सीते ॥६३॥ वानरचेष्टा श्रीरघुनाथ । देखोनि खदखदां हांसत । हांसतां सौमित्र मूर्च्छित। चेष्टायुक्त वानर ॥६४॥

मारुतीची स्तुती : देखोनि वानरांचे भार । सुखी जाला श्रीरामचंद्र । तंव येवोनि पवनपुत्र[१]। केला नमस्कार श्रीरामा ॥६५॥ सुग्रीव सांगे निजनिवाडे । सकळ सैन्य एकीकडे । न तुके हनुमंताचेनि पाडें[२] । अति बळ गाढें हनुमंताचें ॥६६॥ हनुमंताच्या बळापुढें । सकळ सैन्य तें बापुडें । फोडिलें राहूचें जाभाडें । रवि यापुढें चळीं कांपे ॥६७॥

वाळीचे निवारण मारुतीने कां केले नाही : ऐकोनि सुग्रीवाची मात । श्रीराम जाला विस्मित। आतुर्बळी[३] हा हनुमंत । श्रीरघुनाम स्वयें जाणे॥६८॥ असतां निजसखा हनुमंत। तुझा साधावया कार्यार्थ । वाळीचा केला नाहीं घात । तों वृत्तांत मज सांगें ॥६९॥ ऐसें पुसतां सुग्रीवासी । तंव तेथें आला अगस्ति ऋषी । देखोनि सकळ वानरांसी । भेटे विशेषीं श्रीरामा ॥७०॥

अगस्तींचे आगमन व रामांच्या प्रश्नाला उत्तर : पर्वविशेषीं स्नानासी । पंपे आला अगस्ति ऋषी। देखोनियां श्रीरामासी। आला उल्लासीं भेटावया ॥७१॥ ऋषीस देवोनि सन्मान । श्रीरामें केलें अभिवंदन । मग बैसवोनि सावधान । केला प्रश्न श्रीरामें ॥७२॥ सुग्रीवसखा हनुमंत । असतां अतुर्बळी वीर्यवंत। वाळीचा केला नाहीं घात । तो वृत्तांत मज सांगें ॥७३॥ हनुमंताचे जन्मकथन । नारदें सांगितलें संपूर्ण । तें मी सांगेन आपण। सावधान अवधारीं॥७४॥ हनुमंताचे जन्मकर्म । बाळपणीं अति पराक्रम । कथा रम्य मनोरम। श्रोता संपूर्ण श्रीराम ॥७५॥ हनुमंताचें बाळकिराण[४]। ग्रासूं गेला रविबिंब पूर्ण। ते कथा परम पावन। एकाजनार्दन विनवीत ॥७६॥ रामायणींचा एक एक श्लोक। वेदशास्त्राहूंनी अधिक । एकलें रामनाम एक। होय छेदक जन्ममरणा॥७७॥ ऐसी रामायणींची कथा। अगस्ति वक्ता श्रीराम श्रोता। जन्मप्रयोग हनुमंता। होय सांगता ऋषिवर्य ॥७८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सर्वसुग्रीवसेना श्रीरामदर्शनं नाम नवमोऽध्यायः ॥९॥ ॥ओव्या ॥७८॥ श्लोक ॥२॥ एवं ॥८०॥

# अध्याय दहावा

॥ श्रीजानकीवल्लभाय नमः ॥

## हनुमंत जन्मकथा

**श्रीरामांचा प्रश्न :** अगस्तिमहामुनीप्रती । प्रश्न केला श्रीरघुपतीं । सुग्रीवा निजसखा मारुती । अद्‌भुतशक्ती असतां ॥१॥ तेणें साधावया मित्र कार्यार्था । कां न करीच वाळीच्या घाता । या हनुमंताच्या भावार्था । मजला साद्यंत[५] सांगावें ॥२॥

**राघवस्य वचः श्रुत्वा हेतुयुक्तमृषिस्तदा । हनूमतः समक्षं तमिदं वचनमब्रवीत् ॥१॥**

**अगस्ती मारुतीची जन्मकथा सांगतात :** ऐसें पुसता श्रीरघुनाथ । अगस्ति मुनि आनंदयुक्त । हनुमंताचें निजसामर्थ्य । असे सांगत स्वानंदे ॥३॥ आतां सांगेन श्रीरघुनाथा । हनुमंताची जन्मकथा। सकळमूळारंभवार्ता । होय सांगता अगस्ति॥४॥ पुत्रेष्टियाग दशरथासी। ताटप्रसाद यज्ञपुरुषीं। वसिष्ठें करोनि विभागांसी। तिघी राणियांसी दीधलें ॥५॥ कैकेयीभाग हरिला घारीं । ते शापद्वारें जाली नारी । तेथें वर्तली नवलपरी । तेही अवधारीं श्रीराम ॥६॥ यज्ञभाग तिच्या उदरीं। व्हावया श्रीरामसहाकारी । ब्रह्मा तीतें करी वानरीनारी। अंजनी

---

**शब्दार्थ :** १. हनुमंत, मारुती, २. बरोबरीने, ३. मोठा पराक्रमी, ४. बालपणींचे उड्डाण, ५. मूळापासून शेवटपर्यंत.

केसरीची ॥७॥ उदरीं यज्ञभाग संपूर्ण । त्याचें व्हावया प्ररोहण[१] । यज्ञपुरुषाचा निजप्राण । तिसीं आपण विचरला ॥८॥ यज्ञभाग अति बळवंत । जन्म पावला हनुमंत । यालागीं म्हणती वायुसुत । अंजनीपुत[२] वानरत्वें ॥९॥ दो भागांचे तुम्ही चवघे जण। सगळ्या भागाचा हनुमंत पूर्ण । यालागीं बळप्रतापी जाण । अति संपन्न बळत्वें ॥१०॥ राम लक्ष्मण शत्रुघ्न भरता । यज्ञभागी हनुमंता । तुम्हीं पांच एकात्मतां । भिन्न दिसतां अभिन्न ॥११॥ ऐकोनि अगस्तीची मात । संतोषला श्रीरघुनाथ । हर्षयुक्त स्वयें हनुमंत । आनंदभरित सौमित्र ॥१२॥ अगस्ति म्हणे श्रीरघुपती । बाळपणी याची ख्याती । ते मी सांगेन तुजप्रती। अत्यद्भुत शक्ती हनुमंता ॥१३॥

हनुमंताला गर्भातच जन्मजात कौपीन, त्यामुळे अंजनीमातेला नग्न पुत्रदर्शन नाही : ब्रह्मचर्या अति गोमटी । हनुमंतासी गर्भकांसोटी । अंजनी माता देखे दृष्टीं । कीं राम जगजेठी देखेल ॥१४॥ हनुमंताचें लिंगदर्शन। मुख्य माता न देखे आपण। मग इतरा देखों शके कोण। ब्रह्मचारी पूर्ण कपिराज ॥१५॥ हनुमंत पुसे बाळभावें। माःतें म्यां क्षुधेसी काय भक्षावें । आरक्त फळ जें देखावें । तेंचि खावें म्हणे माता ॥१६॥

पावकार्कनिभं पुत्रं प्रसूय जननी गृहात् । फलान्याहर्तुकामा सा निष्कांता च वनं तदा ॥२॥
यशः कर्तुं स्ववीर्येण क्षुधया भृशमर्दितः । अर्धोदितं विवस्वंतं जपापुष्पसमप्रभम् ॥३॥
ददर्श फललाभाय चोत्पपात रविं प्रति ॥४॥

जन्मतांचि हनुमंत। अग्नितेजें दीप्तिमंत । बालार्कप्रभासम[३] भासत । दीप्तिमंत मारुती ॥१७॥

मारुतीची बाळपणी क्षुधाशांतीसाठी सूर्यावर झेप : सूर्योदय नव्हतां तेथ । सेजे निजवोनि हनुमंत । अंजनी गेली स्वयें वनांत। फळें त्वरित आणावया ॥१८॥ मातृविहीन हनुमंत। रुदन करी अति क्षुधित। देखोनि बालार्क आरक्त। फळभक्षार्थ उडाला ॥१९॥ क्षुधेनें पीडिला प्रबळ । बालार्क फळ अति वर्तुळ । भक्षावया स्वयें तत्काळ । उडे चपळस्वभावें ॥२०॥ हनुमंताची उड्डानशक्ती । ते गति नये गरुडाप्रती । वायुसुताची शीघ्रगती । मनोवृत्ति ठणकली ॥२१॥ भक्षावया बालार्कासी । ऊर्ध्वगति हनुमंतासी । देखोनि विस्मयो सुरवरांसी। देवऋषी विस्मित ॥२२॥ धैर्य शौर्य महावीर्य । शीघ्रगतिगमनें गांभीर्य । हनुमंतांचें परम औदार्य । सुरवर शौर्य वानिती ॥२३॥ हनुमंताच्या समानशक्ती । कोणी नाहीं त्रिजगतीं । बाळभावें शीघ्रगतीं । सूर्यभक्षार्थीं धांवला॥२४॥

सूर्यदाहभयं द्रक्ष्यन्वायुस्तुहिनशीतलः । यमेव दिवसं चासौ ग्रहीतुं भास्करं गतः ॥५॥
तमेव दिवसं राहुर्जिघृक्षति दिवाकरम् ॥६॥

वायूने त्याचे सूर्याच्या प्रखर तापापासून रक्षण केले : मनोगति सांडोनि मार्गे । हनुमंत चालिला ऊर्ध्वमार्गे । सूर्यकिरणाचे निदाघयोगें। होईल सर्वांग भस्मित॥२५॥ जाणोनि वायु पिता । निजपुत्रातें संरक्षिता । हिमांबुकणें[४] निवविता । होय चालता शिशुमार्गें॥२६॥ वायु धरूं पाहे हनुमंतासी । तंव तो नाटोपे तयासी। वेगीं आला सूर्यापासीं । फळभावेसीं[५] भक्षावया ॥२७॥

तोच दिवस सूर्यग्रहणाचा; आलेल्या राहूला शेपटीचा भयंकर तडाखा : हनुमंत आला बिंबापासीं। रविराहुग्रहण तेच दिवशीं। राहु ग्रासितां सूर्यासी । हनुमान मानसीं कोपला ॥२८॥ माझ्या गोड ग्रासाआड । येथें कोण आला मूढ। राहूचें फोडिलें जाभाड। पुच्छ सुदृढ हाणोनी ॥२९॥ पुच्छीं हाणितां वानरा। घायें राहु होय घाबरा। नाकीं मुखीं रुधिरधारा। थरथरां कांपत॥३०॥ धाकें थरथरां कांपत । गगनीं गरगरां भोंवत। राहु पडतां अति मूर्च्छित ।

शब्दार्थ : १. वृद्धी, २. अंजनीचा पुत्र, ३. सकाळच्या सूर्यासमान, ४. थंड उदकाच्या बिंदूंनी, ५. फळ अशा कल्पनेने.

धावोनि केत धरी त्यासी ॥३१॥ राहू केतू अति आप्तता[1]। दोघां देहीं एकात्मता। केतु येवोनि राहुसाह्यार्था। कोपें हनुमंताकडे पाहे ॥३२॥ सकेतु राहु देखोनि दृष्टीं। रागें हनुमंत हाणी मुष्टी। दोघां पळतां पायपोटीं। हाक उठी ग्रहचक्रीं ॥३३॥

ग्रहांच्या सांगण्यावरून राहूचे इंद्राकडे गाऱ्हाणे : ग्रह सांगती सिंहिकासुता[2]। पुच्छकेतु आला तुम्हांभोवता। इंद्र अधिकारी नियंता। त्यासी तत्वतां तुम्ही सांगा ॥३४॥

स चेंद्रभवनं गत्वा सरोषः सिंहिकासुतः। क्षुधापानोदनं कृत्वा चंद्रार्कौ मम वासव ॥७॥
किमिदानीं त्वया दत्तो वरोऽन्यस्मै सुरेश्वर। अद्याहं पर्वकाले तु जिघृक्षुः सूर्यमागतः ॥८॥
आगत्यान्यः कोऽपि राहुर्जग्राह सहसा रविम् ॥९॥

राहु जो कां सिंहिकासुत। वानरघायें रुधिरोक्षित[3]। इंद्रापासीं आला त्वरित। शंख करित सांगावया ॥३५॥ माझी जीविका जीवनवृत्ती। चंद्रसूर्यग्रहणस्थिती। आजिंचे ग्रहणकाळप्राप्ती। रविग्रहणार्थीं मी गेलों ॥३६॥ तंव मजहूनि बळवंत। पुच्छराहु येवोनि तेथ। घायें करोनि रुधिरांकित। धाडिलें येथें बोंबेसीं ॥३७॥ तूं नियंता[4] देवाधिदेवो। माझा न देखतां अन्यावो। तूं कां धाडिला पुच्छराहो। तेणे मज पाहो गांजिलें ॥३८॥ शेखीं[5] मज न पुसतां। तुवां करविलें गुप्तघाता। म्यां काय करावें गा आतां। मज तत्वतां तूं सांगें ॥३९॥ पुच्छराहु येवोनि तेथ। सूर्य आकळिला समस्त। माझा करूं धांवे घात। आलों रडत सांगावया ॥४०॥

स राहोर्वचनं श्रुत्वा वासवः संभ्रमान्वितः। इंद्रः करींद्रमारुह्य राहुं कृत्वां पुरःसरम् ॥१०॥
ततः सूर्यं समुत्सृज्य राहुं स्थूलमवेक्ष्य सः। उत्पपात पुनर्व्योम्नि ग्रहीतुं सिंहिकासुतम् ॥११॥

इंद्राची मारुतीवर स्वारी, राहूचा थरकाप : ऐकोनि राहूचा वचनार्थ। इंद्रादि देव अति विस्मित। ग्रहचक्रातें विपरीत। कर्ता येथ तो कोण ॥४१॥ कोणें केला नवा राहो। त्यासी निर्दळावया पहाहों। घेवानि सुरसेनासमुदावो। इंद्र स्वयमेव तेथ आला ॥४२॥ ऐरावत सालंकार। गजेंद्री बैसोनियां इंद्र। करीं घेवोनिया वज्र। सहपरिवार तेथें आला ॥४३॥ इंद्र राहू पुढें बैसवोनि। नवा राहु दाखवीं म्हणोनि। जेणें तुज गांजिलें बळेंकरूनी। त्याचें निर्दळण मी करीन ॥४४॥ दाखवितां हनुमंतासी। थरथरा कंप सुटला राहूसी। दडोनी ऐरावतीचे पाठीसीं। दावी इंद्रासी दुरोनी ॥४५॥ येरीकडे हनुमंत। धांविन्नला रवि ग्रासावया क्षुधित। तेणें सूर्य चळीं कांपत। अति अनर्थ ओढवला ॥४६॥ दिनमान सांडोनि सविता। पळों न लाहे सर्वथा। निवारूं शकेना हनुमंता। अति आकांत पावला ॥४७॥ तेचि संधीं इंद्रापासीं। वानरें देखोनि राहूसी। रागें निघाला निर्दाळावयासी। अति वेगेंसी धांवला ॥४८॥ मज क्षुधिताच्या आहारासीं। राहु ओढवला[6] विवसी। धरोनी इंद्राच्या बळासी। माझ्या ग्रासासी घेवों आला ॥४९॥ ऐसें बोलोनि हनुमंत। सूर्यग्रासाची सांडोनि मात[7]। राहूचा करूं धांवे घात। येरु बोंभात[8] इंद्रातें ॥५०॥ राहू पळे इंद्राकडे। तेथें तंव हनुमंताची उडी पडे। येरु अति आक्रोशे रडे। इंद्रापुढें सांगतां ॥५१॥

इंद्र इंद्रेति मां त्राहि मुहुर्मुहुरभाषत। श्रुत्वेंद्रः प्राह माभैषीरहमेन निषूदये ॥१२॥
बलान्नाहन्मि राजानमभिदुद्राव मारुतीः। मुहूर्तमभवाद्धोरं कालाग्निरिव मूर्च्छितः ॥१३॥

हनुमंत राहूतें मर्दूं पाहत। इंद्र इंद्र नामें आक्रंदत। वानरें पुरविला अंत। आरंबळत आक्रोशें ॥५२॥ ऐकोनि राहूचा आकांत। इंद्र नाभीकार[9] देत। भिवों नको धरीं पुरुषार्थ। याचा घात मी करीन ॥५३॥ ऐसें बोलोनि अमरपती। वेगीं प्रेरिला ऐरावती। त्यावरी धांविन्नला मारुती। हस्तें हस्ती उपटावया ॥५४॥ वानरु ऐरावती आकळी। तेणें पुच्छें ठोकिला

शब्दार्थ : १.स्नेह, २. राहूला, ३. रक्तबंबाळ होऊन, ४. सर्वांवर अधिकार चालविणारा, ५. शेवटी, ६. सरसावला, ७. गोष्ट. ८. ओरड लागला, ९. भिऊ नको म्हणन अभयवचन.

गंडस्थळीं । गज आक्रंदोनि देत किंकाळी । भयें चळीं कांपत ॥५५॥ पुच्छ नव्हे तो वज्रघात। घायें विमुख[1] ऐरावत । इंद्र बळें आकळित । तरी युद्धात परतेना ॥५६॥ पुच्छ हाणितां वानरें। गजें घेतलें घायवारें । शक्रा शक्ति तों नावरे। केलें घाबरें इंद्रासी ॥५७॥ इंद्र देवांमाजी बळी। तो करितां हनुमंतासी कळी । वानरें मुकुट पाडिला तळीं। झोटी[2] मोकळी इंद्राची ॥५८॥ मुकुट घ्यावया आपणापासी । बाळभावें न कळे त्यासी। इंद्र केला कासाविसीं। मुरुड्‌डणांसी मर्दोनी ॥५९॥ इंद्र गांजिला कपींद्रें । यम धांवन्निला कैवारें । दंड हाणोनि सत्वरें। केलें वानरें विपरीत॥६०॥ यम हाणी जंव दंडेसीं । हनुमान आदळला अंगासी। थापा हाणोनियां त्यासी । तोंडघसीं पाडिलें ॥६१॥ घाय हाणोनि प्रचंड। सांडोनियां बळबंड। यमाचेंच ठेंचिलें तोंड । बळ वितंड वानरा ॥६२॥ यमें गांजिलें जगासी । वानरें गांजिलें यमासी। घायें मिळविला धुळीसीं। बळराशिवानर॥६३॥ यम गांजिला दारुण। भेणें पळाला वरुण । कुबेर घाली लोटांगण । चरणा शरण कपिराजा ॥६४॥ हनुमंतें अर्धक्षणीं। सुरसेना नेली भंगोनी । अवघ्या केली दाणादाणी। महापळणी[3] देवांसी॥६५॥ हनुमंताच्या वेगापुढे। आम्हीं पळावें कोणीकडे । एक एकामागें दडे। जीवसांकडे[4] देवांसी॥६६॥ सगज उपटावया इंद्रासी। धरोनि ऐरावतीपुच्छासी। वानरें भोवंडितां आकाशीं । सदेव ऋषी गजबजिले ॥६७॥

**इंद्राच्या वज्रप्रहाराने हनुमंत मूर्च्छित, त्यामुळे वायूचा कोप :** हनुमंतबळ देखोनि दृष्टीं । इंद्र उपटिला सृष्टीं । जगीं एकचि बोंब उठी । महाहठी वानरु ॥६८॥ लघुलाघवें सुरपती । वज्रें हाणिला मारुती । घावो लागता हनुमंताप्रती। पहिला क्षितीं मूर्च्छित ॥६९॥ मेरुशिखर-पाठारांत । हनुमान पडिला मूर्च्छित । वायु पिता येवोनि त्वरित । निजसुत उचलिला॥७०॥ क्षुधिता माझिया तान्हियासी । इंद्र हाणोनि वज्रेंसीं । मूर्च्छित पाडिलें भूमीसीं। वायु मानसीं क्षोभला ॥७१॥ वायु क्षोभोनि संपूर्ण । आकर्षिले जगाचे प्राण। ब्रह्मादिकां संकट पूर्ण । ऋषिभूतगण तळमळिती ॥७२॥

रुरोध सर्वभूतानि वायुः सर्वमिवान्तरम् । वायुप्रकोपाद्भूतानि निरुच्छ्‌वासानि सर्वशः ॥१४॥
ततोऽमराः सगंधर्वाः सयक्षासुरमानुषाः । प्रजाप्रतिं समाधावन्दुःखिताश्च सूखेच्छया ॥१५॥

**वायूचा विलाप व क्षोभ, त्याचे गंभीर परिणाम :** वायु क्षोभोनि सक्रोध। अंतरीं केला प्राणरोध । प्राणापाना ठेले स्तब्ध । अति विरुद्ध भूतांसी ॥७३॥ प्राणनिरोधाची स्थिती। ठेली भूतांची नित्यगती। कोणा नाहीं सुखप्राप्ती। तळमळिती अति दुःखे॥७४॥ यक्ष राक्षस देव गंधर्व । सिद्धचारणादि मानव । सत्यलोका येवोनि सर्व। पितामह[5] वंदिला।॥७५॥ प्राणनिरोधाचे कष्ट । ऋषी सांगती श्रेष्ठ श्रेष्ठ । तंव ब्रह्मयाचें फुगलें पोट। अति संकट सर्वां ॥७६॥ ब्रह्मा सर्वांसांगे समस्तां । इंद्रें हाणोनि वज्रघाता । मूर्च्छित पाडिलें हनुमंता। वायु पुत्रार्थ[6] क्षोभला।॥७७॥ वायु निजपुत्रदुःखार्थी । भूतांचिया अंतर्गती । निरोधिल्या प्राणवृत्ती। पुत्रकार्यार्थी क्षोभतो ॥७८॥ राहुकैवारें अमरनाथ । वज्रें हाणितला हनुमंत । पुत्र पडतांचि मूर्च्छित । वायु प्राणांत क्षोभला ॥७९॥ हनुमंत घेवोनि पुढे । वायु स्फुंदस्फुंदोनि रडे । तान्हें बाळ हें बापुडें । इंद्रे महामूढें मारिला ॥८०॥ माझा निमाल्या हनुमंत । इंद्रादि देवांचा मी घात । करीन एका निमेषांत । वायु प्राणांत क्षोभला ॥८१॥ प्राणवृत्ती चळतां वायु । तो तंव जगांचा जगदायु । पुत्रक्षोभें क्षोभोनि[7] बहु । भूतां प्रळयु मांडिला ॥८२॥

**प्राणवायूच्या निरोधामुळे जगताचा स्तंभ :** प्राणें प्राण्यां नित्य सुख । प्राणें प्राणयां नित्य हरिख । प्राण जातांच निःशेष । परम दुःख प्राणियांसी ॥८३॥ प्राण गेलिया निघोनी ।

**शब्दार्थ :** १. पराङ्‌मुख, २. शेंडी, केश, ३. धावाधाव, पळ, ४. प्राणसंकट, ५. ब्रह्मदेव, ६. पुत्राकरिता, ७. रागावून.

काष्ठप्राय प्राणी जनीं । दृष्टीं पाहता सचैलस्नानीं[1] । विटाळ मानी जग त्याचा ॥८४॥ यालागीं प्राणें पवित्रता । प्राणें प्रीति प्रीतिवंता । प्राण गेलिया तत्वतां[2] । प्रिया प्रियाकांता स्पर्शेना ॥८५॥ पत्नी प्रिया परम आप्त । नित्य एकांती भोगी जीवित । प्राण गेलिया प्राणि प्रेत । पतीसी भूत मानी पत्नी ॥८६॥ ऐसा प्राण प्रिय समस्तां । तो क्षोभोनि जाईल आतां। यालागीं वांचवावें हनुमंता। वैकुंठनाथा सांगोनी ॥८७॥ प्राणें पीडिला शूळपाणी[3]। वायूची करावया बुझावणी[4]। तोही आला तत्क्षणीं । वांचवा म्हणोनी हनुमंता ॥८८॥ शिव शक्र[5] चतुरानन । तिहीं प्रार्थिला जनार्दन। हनुमंता द्यावया जीवदान। अवघे जण निघाले ॥८९॥

तद्यमस्तव यत्रास्ते मारुतो रुक्प्रदो हि नः । मा विनाशं गमिष्याम अप्रसाद्यादितेः सूतम् ॥१६॥

ब्रह्महरिहरान्दृष्ट्वा वायुः पुत्रवधार्दितः । शिशुकं तं समादाय उत्तस्थौ धातुरग्रतः ॥१७॥

ब्रह्मादिक देवांचे आगमन : ब्रह्मा हरि हर तिघे जण । स्वयें इंद्रादि देवगण । ऋषि श्रेष्ठ श्रेष्ठ प्रजा पूर्ण। अवघे जण तेथ आले ॥९०॥ जेथें घेवोनी हनुमंत। वायु बैसलासे रडत । प्राणरोधें क्रोधयुक्त। आले समस्त ते ठाया॥९१॥ देखोनि ब्रह्मा हरि हर। वायु उठोनि सत्वर । कडिये घेवोनियां कुमर। केला नमस्कार सद्भावें॥९२॥ एकें पुत्रघाताकारणें । अवघें जगचि निर्दळणें । ऐसें न करावें आपणें। क्षमा करणे प्राणनाथा ॥९३॥ वायु बोले क्षोभकता[6]। माझा हनुमंत न उठतां । करीन इंद्रादिकांच्या घाता। जाण तत्वतां प्रजापति ॥९४॥

वायूच्या शोकाला देवांचे उत्तर, मारुतीला जन्ममरणाचा संभवच नाही, देवांचे वरदान : ऐकोनि वायूचें वचन। हांसिन्नला श्रीजनार्दन। हनुमंताचें भाग्य पूर्ण । जन्ममरण त्या नाहीं ॥९५॥ श्रीरामभाग्याच्या द्विगुणित । जन्म पावला हनुमंत। त्यासी स्वप्नीं नाहीं मृत्य । असे हनुमंत चिरंजीव॥९६॥ वरद वदला श्रीजनार्दन। तें ऐकोनि त्रिनयन । वरद वदे संतोषोन। सावधान अवधारा॥९७॥ माझिया तृतीय नयनींचा वन्ही। जाळूं न शके या लागूनी। त्रिशूळ न शके अंगभेदनीं। वरदवाणीं शिवाची॥९८॥ विष्णु वरद वदे तत्पर । गदादि बाण चक्र दुर्धर । तेणें न भेदे याचे शरीर। अजरामर हनुमंत॥९९॥ ब्रह्मा वदे निजवरदेंसीं । ब्रह्मदंड ब्रह्मशापेंसीं । बांधूं न शकें हनुमंतासी । सकळ द्वंद्वासी निर्मुक्त ॥१००॥

इंद्राचा वर, कमळमाला अर्पण : इंद्र वदे निजवरदासी । माझें वज्र लागल्या हनूसी । तेणें हनुमंत नाम यासी । होईल सर्वांसी विख्यात॥१॥ माझें वज्र न बाधी पाहीं। हा होईल वज्रदेही। सुरासुरां नागवे पाहीं। याची ख्याती तिहीं लोकीं ॥२॥ ऋषकौशिकि कमळमाळा । सुकों नेणे कदा काळा। इंद्रें उल्हासें त्या वेळा। घातली गळा हनुमंताचे ॥३॥

सूर्य, वरुण, यम, कुबेर आणि विश्वकर्मा यांचे वरदानः निरवरद वदे सविता। मजहूनि शताधिकता। जों जों वृद्धि होईल हनुमंता। राक्षसघाता करावया॥४॥ हा वांछीला सज्ञानता। तैं सकळ वेदशास्त्रार्था। मी देईन अति योग्यता। होईल विख्यात परमार्थी ॥५॥ वरुण वदे वरदान । वर्षें शत जळीं निमग्न। होतां हनुमंता नये मरण । पाशबंधन कदा न बाधी ॥६॥ यम वरद वदे वितंड । सुख पावसी तूं प्रचंड। तुज बाधीना यमकाळदंड। आरोग्य अखंड अजरत्वें[7]॥७॥ धनेश[8] वदे निजवरदासी। युद्ध करितां वर्षानुवर्षी। कदाकाळीं श्रम न पावसी। अस्त्रबाधेसीं बाधवेना ॥८॥ विश्वकर्मा वदे वरदान । म्यां शस्त्रें केलीं निर्माण। तीं हनुमंतासीं युद्धी जाण। शस्त्रें संपूर्ण न बाधती ॥९॥ माझें शिल्पशास्त्रींचें ज्ञान। तें तूं पावसी संपूर्ण। ऐसें बोलोनि आपण। दे आलिंगन हनुमंता ॥११०॥

चतुर्मुखस्तुष्टमना वायुमाह जगद्गुरुः । अमित्राणां भयंकारी मित्राणामभयंकरः ॥१८॥

---

शब्दार्थ : १. वस्त्रासुद्धा स्नान करून, २. खरोखर, ३. महादेव, ४. समजूत, ५. इंद्र, ६. रागावून, ७. जरा नसल्यामुळे ८. कुबेर.

अजेयो भविता पुत्रस्तव मारुत मारुती:। रोमहर्षकराण्येव कर्ता कर्माणि संयुगे ॥१९॥
एवमुक्त्वा तमामंत्र्य मारुतं त्वमरैः सह । यथागतं ययुः सर्वे पितामहपुरोगमाः ॥२०॥

ब्रह्मदेवाचे वरदान व भविष्यकथन : ब्रह्मा जगद्गुरु सर्वांसी । संतोषोनि सांगे वायूसी । हनुमंत भाग्याची राशी । सकळ देव त्यासीं तुष्टले ॥११॥ धीर वीर महाशूर । अदट दाटुगा वज्रशरीर। बाधूं न शके शस्त्रसंभार। तुझा पुत्र सभाग्य ॥१२॥ सभाग्य भाग्यें हनुमंता। गांजोनियां लंकानाथा । शुद्धि आणोनियां सीता। सुखी रघुनाथा हा करील।॥१३॥ तुझा पुत्र आतुर्बळी । घेईल इंद्रजितासवें फळी[1] । करोनि राक्षसां खंदळी। लंकाहोळी हा करील ॥१४॥ परम भाग्य हनुमंता। भेटोनि सुखी करील सीता । तिची शुद्धि आणील तत्वतां। श्रीरघुनाथा सुखार्थ ॥१५॥ श्रीरामाच्या कटकांत । अदट दाटुगा वीर हनुमंत । सेंवाबळें परम आप्त। श्रीरघुनाथा मानील ॥१६॥ भविष्य हनुमंताची ख्याती । स्वयें सांगत प्रजापती। उल्लास वायूच्या चित्तीं । पुत्रकीर्ती ऐकोनी ॥१७॥

वायूचा आनंद व हनुमंताला अंजनीकडे नेणे : वरद लाहोनि हनुमंता । वायु अति उल्लासतां[2]। मुक्त केली प्राणरोधता। तेणें समस्तां सुख जालें ॥१८॥ सुखी जाले सुरनर । सुखी जाले ऋषीश्वर । सुखी जालें चराचर। जयजयकार तिहीं लोकीं॥१९॥ वर देवोनि हनुमंतासी। सुरवर गेले निजधामासी[3]। वायूनें आणोनि हनुमंतासी । अंजनीपासीं दीधलें ॥१२०॥ हनुमंताची बाळकीर्ती । विस्तारिलीं त्रिजगतीं। फळार्थ आकळितां गभस्तीं[4] । लाविली ख्याती सुरवरां ॥२१॥ हनुमंताचें सामर्थ्य सिद्ध । तेंचि देवीं दिधलें वरद । हनुमंतकीर्ती अति अगाध । तेणें सुख श्रीरामा ॥२२॥ जें सामर्थ्य श्रीरामासी । तेचि शक्ति हनुमंतासी। एकात्मता अहर्निशी । लोकक्रियेसीं देवभक्त ॥२३॥

रामांचें व हनुमंताचें सामर्थ्य सारखेच : लोकक्रियासंग्रहार्थ। श्रीराम देव हनुमान भक्त। तोचि रामायणीं ग्रंथ । भक्तसामर्थ्य वायुपुत्रीं ॥२४॥ डोंगरीं दावाग्नीची ख्याती । घरींच्या दीपा तेचि निजदीप्ती। दोहींची एक दाहकशक्ती । तेंवी देवभक्तीं सामर्थ्य ॥२५॥

त्याच्या बाललीलेंत ऋषींना त्रास, ब्रह्मदेवाकडे तक्रारपूर्वक गाऱ्हाणे : हनुमान असतां मातेप्रतीं। अंगीं होतां अद्भुतशक्ती । करितां बाळभावें उद्धती[5] । ऋषी हितोक्ती शापिला ॥२६॥ गंगातीरीं ऋषींची वस्ती । अवघे आश्रम उचलोनि हातीं । हनुमंत ठेवी दूर पर्वतीं । जळ न पवती स्नानपाना॥२७॥ ऋषी आपुल्या तप:सामर्थ्यीं । पुढती गंगातीरा येती। हनुमान उचलोनी मागुती । घालीं पर्वती अति दूर॥१८॥ पुष्पपर्वतीं ऋषी वसतीं। सकळ पर्वत उचलोनी हातीं । हनुमान घाली उखराप्रती[6]। ऋषी तळमळती जळफळां ॥२९॥ बाळभावाच्या परवडीं । ऋषींचीं यज्ञपात्रें फोडी । कुशासनें अजिनें फाडी । जानवीं तोडी भटांचीं ॥१३०॥ बटु ब्रह्मचारी कवळोनी पुच्छीं । हनुमान स्वयें उडे आकाशीं । लेंकरें होती कासाविसी । ऋषिपत्न्यासी तळमळ ॥३१॥ मारोनि गज करवडें । ऋषिआश्रमीं टाकी मढें । काढितां शिष्यसमुदाव रडे । उपाव पुढें चालेना ॥३२॥ ब्रह्मवराचें वरदोक्तीं । शाप न चले हनुमंताप्रती । अवघे आले ब्रह्मयासी एकांतीं । बुद्धि पुसती प्रबुद्ध ॥३३॥

ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून ऋषींचा फार सौम्य शाप : ब्रह्मा सांगे ऋषींप्रती। शाप द्यावा अति हितोक्तीं । मारूति जाव भेटे रघुपतीं । तंववरी तुझी शक्ती लीन राहो ॥३४॥ जेंवी यौवन सौभाग्यथोरी । अति गुप्तता राहे कुमारीं । तेंवी तुझी सामर्थ्यथोरी । तुजमाझारीं लीन राहो॥३५॥ जेंवी आलिया तारुण्यता । यौवनें मुसमुसी होय वनिता । तेंवी भेटल्या श्रीरघुनाथा । निजसामर्थ्या पावसी ॥३६॥

---

**शब्दार्थ :** १. झोंबी, २. उल्हासाने, ३. आपापल्या जागी, ४. सूर्य, ५. दांडगाई, ६. माळजमिनीवर.

शापामुळे शक्ती लीन झाली : ऐसें ऋषीश्वर शापिती । जाली हनुमंताची लीन शक्ती । मग राहिला साधुवृत्तीं । ऋषींप्रति अति नम्र ॥३७॥

मदाचा प्रभाव : द्रव्यमद तारुण्यमद । अंगीं बळाचा शक्तिमद । तेणे पुरुष होय स्तब्ध । करी विरोध अभिमानें ॥३८॥ व्यापार जालिया व्यापारी । नाना अनन्य कर्म करी । तोचि जालिया निराधारी । मग विचारी पापपुण्य ॥३९॥ कैंची संध्या कैंचें स्नान । केंवी पाविजे निजज्ञान । अधिकारू जालिया क्षीण । विवेक पूर्ण प्राण्यासी ॥१४०॥

परमार्थाकडे अधिक लक्ष : तैसें जालें हनुमंता। निजबळ लीन होतां। म्यां पावावें परमार्था। साधुसंतां भजावें ॥४१॥ पूर्वीं सूर्याचें वरदान। जेव्हां हनुमान इच्छील ज्ञान। तेव्हांचि होवोनि सुप्रसन्न। ज्ञानसंपन्न मी कर्ता ॥४२॥ तें ज्ञान मारुती वांच्छितां । अंतरीं उगवोनि चित्सविता[१]। ज्ञान विज्ञान[२] लीनता। देहीं विदेहता श्रीरामीं ॥४३॥ ज्ञानविज्ञानसंतृप्ती। देहीं असोनि विदेहस्थिती[३] । श्रीरामाची अनन्य भक्ती । जाला मारुती जगद्वंद्य ॥४४॥ वाळिसुग्रीवकलहांत । शापें हनुमंती शक्ति गुप्त। यालागीं वाळीचा न करी घात । जाण निश्चित श्रीरामा ॥४५॥ सुग्रीव हनुमंताचा आप्त। परी शापें शक्ति होती गुप्त । यालागीं वाळीचा न करीं पैं घात। जाण निश्चित श्रीरामा ॥४६॥

श्रीरामांचा आनंद व अगस्तींचे गमन : ऐसी हनुमंताची ख्याती। ऐकोनि सुखावला श्रीरघुपती । श्रीरामासी पुसोनि अगस्ती । आश्रमाप्रति स्वयें गेला ॥४७॥ एकाजनार्दना शरण। हनुमंतजन्मनिरूपण । ऐकोनि श्रीरघुनंदन । सुखसंपन्न स्वयें जाला ॥४८॥ सुखावोनि श्रीरघुपती । प्रीतीने आलिंगिला मारुती । हा मज साह्य सीताशुद्ध्यर्थी । रणकंदन करावया ॥१४९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां हनुमज्जन्मकथनं नाम दशमोऽध्याय: ॥१०॥ ॥ओंव्या ॥ ॥१४९॥ श्लोक ॥२०॥ एवं ॥१६९॥

## अध्याय अकरावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### सीतेंच्या शोधासाठी वानरांना पाठविले

सुग्रीवाची श्रीरामांना विनंती : दाविला कपिसेनासंभार। अति दाटुगा हनुमंत वीर । तेणें सुखावला श्रीरामचंद्र । केला नमस्कार सुग्रीवें ॥१॥ वानरसेना कडकडाटीं । वेगीं रिघों लागे वैकुंठीं । अथवा कैलासगिरितटीं। मेरुपृष्ठीं घालूं घाला॥२॥ रिघोनि पाताळाच्या पोटीं । मारूं दानवांच्या कोटी। अथवा दैत्यांचि थाटी । उठाउठीं निर्दाळूं ॥३॥ गण गंधर्व सुरवर। यक्ष राक्षस नर किन्नर। माझे निर्दाळिती वानर। चराचर उलथिती ॥४॥ लोकालोकांहीपरती । कव[४] घालोनि अवचितीं । वानर कृतकार्य साधिती । आज्ञा रघुपति शीघ्र द्यावी ॥५॥

इति ब्रुवंतं सुग्रीवं रामो दशरथात्मजः । बाहुभ्यां संपरिष्वज्य प्रीतो वचनमब्रवीत् ॥१॥
ज्ञायतां सौम्य वैदेही निलये रावणस्य च ॥२॥

सीतेचा शोध करण्याची त्याला आज्ञा : ऐकोनि सुग्रीववचन। श्रीराम जाला सुप्रसन्न। अजानुबाहु पसरोन । दिधलें आलिंगन सुग्रीवा ॥६॥ श्रीराम म्हणे कपिनाथा । सीताशुद्धि करावी आतां । कोण स्थानीं रावण वसता। तेंही तत्वता शोधावें ॥७॥ ऐसें बोलतां श्रीरघुनाथा। सुग्रीवें चरणीं ठेविला माथा। हर्षें वानरां होय सांगता। शोधावी सीता सत्वर ॥८॥

शब्दार्थ : १. ज्ञानसूर्य, २. अनुभवज्ञान, साक्षात्कार, ३. देहातीत स्थिती, ४. वेढा.

विनतनामा महावीर। सवें सेना शतासहस्र। पूर्वे धाडिला सत्वर। सीता सुंदर शोधावया ॥९॥

रावणाचे वसतिस्थानी व संभाव्य ठिकाणी शोधासाठी सुग्रीव वानरांना पाठवितो : रावणाचें वसतिस्थान[1]। सीता शोधावी सावधान। नगर वन उपवन । गिरि गहन शोधावें ॥१०॥

पश्चिमेस सुषेण, पूर्वेस वितन, उत्तरेस शतबळी व इतर चार उपदिशांना वानर पाठविले : तारेचा पिता सुषेण। त्याचे सुग्रीवें वंदूनि चरण । सीताशुद्धीसी जावें आपण। शोधावी संपूर्ण पश्चिमदिशा ॥११॥ पिता तैसा श्वशुर जाण। माझी कळवळ तुज पूर्ण। सीता पहावी सावधान । जन विजन शोधूनी ॥१२॥ सवें शोधावें राष्ट्रोराष्ट्र । पुरें पाटणें नगरें समग्र। ग्राम गुहा गिरिकंदर । शिखरें शिखर शोधावें ॥१३॥ वानरांमाजी अति प्रवर[2]। शतबळीनाम महावीर । सेना शतकोटिसंभार। शोधूं उत्तरे धाडिला ॥१४॥ कोठें वसताहे रावण । हें मुख्य शोधावें आपण । करावें सीतागवेषण[3]। रघुनंदन सुखार्थ ॥१५॥ खटें[4] पुरें खर्वटें[5] नगरें। पर्वतसानु[6] स्रोत[7] शिखरे। गिरि गुहा विवरें कंदरे। मेरुपाठारें शोधावीं ॥१६॥ आग्नेय वायव्य ईशान्य। नैर्ऋत्यदिशेचा नैर्ऋत्य कोण। शोधूं धाडिले कोण कोण। सावधान अवधारा ॥१७॥ पद्म आणि पद्माक्ष । कुमुद आणि कुमुदाक्ष । हे चार वीर अति दक्ष। सुग्रीव प्रत्यक्ष सन्मानी ॥१८॥ कोटि कोटि सेना देवोनी । चौघे धाडिले चौकोणीं । रावणा मारावया शोधोनी । श्रीरामपत्नी आणावया ॥१९॥ रावण नागवेल[8] तत्वतां। शुद्धि आणावी शीघ्रता। मग मी करीन त्याचिये घाता । श्रीरामकांता आणीन॥२०॥ चवघे बोलती आंगवण[9]। रावण मशक बापुडें कोण। दृष्टीं पडलिया जाण । घायें निर्दळण करीन ॥२१॥ खांदीं घेवोनियां सीता। नाचत येऊं तत्वतां। सत्य जाण गा कपिनाथा । सुखी श्रीरघुनाथा करूं आम्हीं ॥२२॥ तार आणि दुसरा तरळ। वानरांमाजी वीर प्रबळ। शोधूं धाडिला पाताळ । कोटिदळ देऊनियां ॥२३॥

सप्तपाताळ : अतळ वितळ सुतळ । रसातळ महातळ। तळातळ आणि पाताळ । सप्त पाताळें शोधावीं ॥२४॥ पाताळ शोधावयाची गती । मी सांगेन जैशा रीतीं । तुम्हीं शोधावें त्याच स्थितीं । सावधानवृत्तीं अवधारा ॥२५॥ पाताळ लोकामाजी जाण । कोठें नंदताहे कोण। सुग्रीव सांगताहे आपण। सीता सावधान शोधावी ॥२६॥ अतळीं वसे मयपुत्र बळ। नामें बळ प्रतापें बळ। त्याचा मंत्री हलकल्लोळ। दुर्धर दैत्य मळ त्याचा ॥२७॥ तेथें शोधावया रावण। आडवे आलिया दैत्यगण। रावणासिहत त्यांतें मर्दोन। सीता आपण आणावी ॥२८॥ वितळीं वसे हाटकेश्वर । उमाकांत कर्पूरगौर । जेथील हाटकनदीचा पूर। सुवर्णसंभार प्रवाहे ॥२९॥ रावण शिवाचा शिवगण । तेथें सांपडलिया जाण। त्याचा घेवोनियां प्राण । सीता आपण आणावी ॥३०॥ सुतळीं महावैष्णव बळी । ज्याचा द्वारपाळ वनमाळी[10]। प्रल्हाद वसे त्याचे जवळीं । वैष्णवकुळीं नांदत ॥३१॥ तेथें सीता आणि रावण । स्वयें शोधावीं सावधान । सांपडतां घेवोनि प्राण । सीता आपण आणावी ॥३२॥ त्रिपुर भेदोनि शंकर । रसातळीं मयासुर । शिवें स्थापिला महावीर । सहपरिवार वसताहे ॥३३॥ तो सोयरा रावणासीं । तेथें तो असेल सीतेंसीं । जीवें मारोनियां त्यासी । जानकीसी आणावें ॥३४॥ महातळीं कुद्रुसुत । जे विपधर[11] क्रोधयुक्त । सर्प वसताती समस्त । रावण तेथ शोधावा ॥३५॥ जरी आतुडला[12] दृष्टीं। तरी मारूनि त्या उठाउठी । सीता आणावी गोरटी । सुखसंतुष्टी श्रीरामा ॥३६॥ तळातळीं तंव दानव । फणी मुख्य रायाचें नांव। निवातकवच वीर सर्व। वैरी स्वयमेव इंद्राचे ॥३७॥ दनुजन्मे दावनमांदी । टवटाळक नामविधीं । संख्य नव्हे शंखशब्दीं । ते मुख्य द्वंद्वा[13] इंद्राचे ॥३८॥ तेथें आतुडलिया रावण। तो निर्दाळावा आपण।

शब्दार्थ : १. राहाण्याची जागा, २. श्रेष्ठ, ३. सीतेचा शोध, ४. खेडी, ५. लहान गाव, ६. पर्वतशिखरे, ७. प्रवाह, ८. न सापडेल, ९. आपले सामर्थ्य, १०. वामन, ११. विष धारण करणारे (सर्प). १२. सापडला, १३. शत्रू.

आडवे दानव आलिया जाण । त्यांचेंही कंदन[1] करावें ॥३९॥ दानवांची असंख्य सृष्टी । तुम्हीं वानर कोट्यनुकोटी । रामकार्य लक्षोनि दृष्टीं । उठाउठीं मारावे ॥४०॥ दानवांचे अति मर्दन । रणीं करोनि रणकंदन । जीवें मारोनि रावण । सीता आपण आणावी ॥४१॥ सातवे पाताळीं महानाग[2] । शतसहस्रफणाभोग[2] । वासुकिप्रमुख अनेग । पद्मिनीभोग भोगिती ॥४२॥ स्वर्गीं उर्वशीं रंभा सुंदरी । का पाताळीं पद्मिनी नारी । त्यांचिया सौंदर्याची थोरी । चराचरीं वाखाणे ॥४३॥ तेथें अति सावधानता । स्वयें शोध करोनि लंकानाथा । सांपडलिया करोनि घाता । सवेग सीता आणावी ॥४४॥

त्याचे खाली शेषशायी : त्या तळीं त्रिशतयोजनांवरी । शेष वसे सहस्रशिरीं । ज्याच्या शरीरभोगावरी । निद्रा करी श्रीरंग ॥४५॥ तेथें जानकी दशशिर[3] । सावध शोधावीं सत्वर । सांपडलिया करोनि मार । सीता सुंदर आणावी ॥४६॥ शुद्धि करावी तेथवरी । तेथोनि परतावें वानरीं । वाट काढितां पुढारीं । तुम्ही अघोरीं पडाल ॥४७॥

त्यापुढें अंधतामिस्र नरक : त्याहूनि तळीं आत्यंतिक । अंधतामिस्र महानरक । त्याहूनि तळीं कूर्म देख । आवरणोदक त्या तळीं ॥४८॥ नरका जाती पापी नर । तुम्ही सांडोनि ते मोहर[4] । रामानामाचा करोनि गजर । भजा सत्वर श्रीरामा ॥४९॥ स्वर्गभोग नावडे ज्यांसी । पुण्य करिती भोगेच्छेंसीं । हे जीव होती पाताळवासी । निजपुण्यासी भोगावया ॥५०॥ पुण्य नाहीं तिळभरी । जे केवळ पापाचारी । ते नर पचती[5] नरकांतरीं । पापेंकरीं[6] महापापी ॥५१॥ वीरां सुग्रीव सांगे गर्जोन । तुम्हांसी नागवे जैं रावण । शीघ्र शुद्धि आणावी आपण । त्याचें निर्दळण मी करीन ॥५२॥

वानरमंडळींचे आवेशपूर्ण आश्वासन : वानर बोलती कैवाडें[7] । रावण दहा तोंडाचे किडें । सहसीता बांधोनि रोकडें । रामापुढें आणूं जी ॥५३॥ पाताळ शोधावयाची गती । सुग्रीवें केली अति निगुतीं । तार वानर स्वर्गाप्रती । ध.डी ते स्थिती अवधारा ॥५४॥

स्वर्गलोक : तार वानर तेजोराशी । सेना शतकोटि तयासरसी । सुग्रीवें धाडिला स्वर्गासी । जानकीसी शोधावया ॥५५॥ सुग्रीव बोले ताराप्रती । मी सांगेन स्वर्गगती । सीता शोधावी ऐशा रीतीं । सावधानवृत्तीं निजबळें ॥५६॥ पृथ्वीहूनियां वरतीं । सूर्यमंडळाखालती । यक्ष रक्ष गंधर्व वसती । तेथें सीता सती शोधावी ॥५७॥ स्वर्ग लोक आहेती बहुत । मी सांगेन सकळित[8] । सीता शोधावी तेथ तेथ । सावचित्त निजवृत्तीं ॥५८॥

सूर्यलोक, तारालोक, बुधलोक : सूर्यलोक लक्षांतरीं । लक्षयोजनें सोम[9] त्यावरी । तारालोक त्याहीवरी । लक्षांतरीं वसताहे ॥५९॥ तारालोकाहूनि वरी । बुधलोक लक्षांतरीं । बुधलोकाच्याही वरी । दों लक्षांतरी भृगुलोक ॥६०॥

भृगुलोक: दैत्यगुरु भृगुपती । रावणा शुक्रा अति प्रीती । तेथें पहावा निश्चितीं । सीतासतीसमवेत ॥६१॥ तेथें देखिल्या सीता सुंदरी । बळें आणितां निजगजरीं । शुक्र बुद्धीं[10] आडवा आला जरी । अवधारीं तेहीविषयीं ॥६२॥ मारूं नये गा ब्राह्मणा । श्रीवामनें केलासे तो काणा । फोडोनियां दुसरिया नयना । रामांगना आणावी ॥६३॥ तेथें नसलिया सीता सती । तरी निघावें शीघ्रगतीं । शुक्रलोकाहीवरती । दोन लक्ष भौमलोक ॥६४॥

भौमलोक, देवगुरू, शनी, सप्तऋषि : भौमालोकाच्याही वरी । दोनी लक्ष योजनांतरी । देवगुरु वस्ती करी । जो सुरवरीं निजपूज्य ॥६५॥ त्याहूनि दोनी लक्ष योजनीं । सूर्यसुत वसे शनी । लक्षयोजन त्याहूनी । वसती मुनी सप्तऋषी ॥६६॥ तेथें आहे अरुंधती । तीसी पुसावी सीता सती । ते सांगेल यथानिगुतीं । श्रीरामाप्रती सत्यत्वें ॥६७॥ तेथोनि

शब्दार्थ : १. नाश, २. शंभर हजार फणांचे मोठे सर्प, ३. रावण, ४. मार्ग, ५. शिजतात, ६. पापामुळे, ७. आवेशाने, ८. थोडक्यात, ९. चंद्र, १०. मुद्दाम होऊन.

दशलक्षयोजनगतीं। वसताहे अमरावती । इंद्र नांदे तो सुरपती। स्वर्गसंपत्तीसमवेत ।।६८।। तेथें गिंवसावें सीतारत्न । चैत्ररथनंदनवन । कल्पतरूंचे उद्यान[१] । स्वयें शोधून पहावें ।।६९।।

अलकानगरी : तेथोनि त्रैलोक्य सकळ । सरलें स्वर्ग मृत्यु पाताळ । त्याहीवरी आहे स्थळ। जनकबाळा[२] शोधावया ।।७०।। कैलासगिरीचे पाठारीं। कुबेराची अलका नगरी । सुवर्णकमळें सुगंधकारी। सजीव सरोवरीं विकासती।।७१।। ज्या कमळांचा सुगंधू । घेतां ब्रह्मा होय स्तब्धू । तेथे शोधावी श्रीरामवधू। कुबेर ज्येष्ठ बंधू रावणाचा।।७२।। तिहीं लोकांहुनि वरतीं। रावणां जावया कैची शक्ती। जवळी आहे सीता सती। तिचेनि गति राक्षसा।।७३।। सीतेचे हरणसंगतीं। राक्षस पावतील ऊर्ध्वगती[३]। हें बोलिलें बहुतां ग्रंथीं। सत्य जाणती सात्त्विक ।।७४।।

ध्रुवलोक, महर्लोक : तिन्हीं लोकांहूनि बाहेरी । भक्तकृपाळू श्रीहरी । अलक्षलक्ष लक्षांतरीं । कृपेनें करी ध्रुवलोक ।।७५।। त्रिलोकीं होतां प्रळयकाळ । ध्रुवासी कदा नव्हे चळ । तो सर्वदा अचळ। यालागीं अढळ ध्रुवपद ।।७६।। ध्रुव वीर शूर भगवद्भक्त। देखोनि सीता आक्रंदत। पाडोनि रावणाचे दांत । सीता निश्चित सोडवील ।।७७।। ध्रुव अढळपदीं सीता । प्रतिपाळील जैसी माता । त्यासीं पुसावे तत्वतां। श्रीरघुनाथसुखार्थ ।।७८।।

तपोलोक : तेथें न लभे जनकबाळ। आणिक स्थळ अति प्रबळ । तें मी सांगेन सकळ । सुनिश्चळ अवधारीं।।७९।। तेथें जावया एकचि गती। विकल्प सांडोनियां चित्तीं। तैं त्या स्थानाची प्राप्ती । जाण निश्चितीं महावीरा ।।८०।। पृथ्वीपासोनि कोटियोजन। महर्लोक वसे जाण। तेथें वसती कल्पायु जन। ते वसतिस्थान तयाचें।।८१।। तेथें शोधावी गा सीता। त्याहूनि कोटियोजनांवरता। जनलोक आहे वसता। तेथील अवस्था अवधारीं ।।८२।। तेथे ऊर्ध्वरेते योगी देख। तेथें वसती सनकादिक। सीता पुसावी आवश्यक। ते निष्टंक[४] सांगतील ।।८३।। तेथोनि दोन कोटि योजनें अधिक । वसताहे तपोलोक। वैराजदेवां निवासक। तपस्वी देख अति शांत ।।८४।। तपें तापस कर्कश होत । क्रोधयुक्त नित्य संतप्त । अल्पासाठीं शाप देत। तेणें भस्म होत तपश्चर्या ।।८५।। ऐसे तापस ते नव्हेत । वैराजदेव अति शांत । तप करिती उपकारार्थ। दीन समस्त तारावया ।।८६।। भावें करितां भगवद्भक्ती । ज्या कर्में जे जे राहती । तें तें संपूर्ण तें करिती। उद्धरार्थीं दीनांच्या।।८७।। त्यांसी करोनियां नमन। सीता पुसावी आपण। पुढें आहे ब्रह्मभुवन । सीताशोधन करावें ।।८८।।

सत्यलोक : तपोलोकाहूनि देख। चारी कोटि उंच अधिक । वसताहे सत्यलोक । चतुर्मुख निजस्वामी।।८९।। सृष्टि स्रजी[५] स्वयें ब्रह्मा । त्याचे लोकाचा निजमहिमा। सावधान ऐकें प्लवंगमा[६] । नाहीं उपमा त्या स्थाना ।।९०।। तेथें मूर्तिमंत वेद । मूर्तिमंत धर्म प्रसिद्ध। मूर्तिमंत ब्रह्मचर्य शुद्ध । तप विशद मूर्तिमंत ।।९१।। गायत्री वेदबीज अति गुप्त । मूर्तिमंत असे तेथ। वाचा मूर्तिमंत वर्तत। दया मूर्तिमंत उल्लासे ।।९२।। तिन्ही याग[७] मूर्तिमंत। तिन्ही एकत्वें नांदत। सत्य सत्यलोकीं मूर्तिमंत । असत्य तेथ असेना ।।९३।।

तेथे राहणारे लोक : ते लोकीं वसतीं कोण लोक। जे गायत्रीमंत्रजापक । जे ब्राह्मण तीर्थोपासक । यागोपासक निष्कामें ।।९४।। ब्राह्मणकार्यीं जे निमाले[८] । गोरक्षणार्थ[९] जीव गेले । परोपकारार्थ प्राण वेंचले । ते पावले सत्यलोक ।।९५।। जिहीं निष्काम द्विज पूजिले । जिहीं निष्काम द्विज भोजिले[१०]। जिहीं निरपेक्ष यजन केलें । ते पावले सत्यलोक ।।९६।। जे कृपाळु दीनार्थ देख। जे दयाळु बंधमोचक। जे सत्यवादी नित्य सात्त्विक। ते सत्यलोकनिवासी ।।९७।। जे परापवादीं[११] मूक। जे परांगनीं[१२] नपुंसक। जे परद्रव्या पराङ्मुख। ते सत्यलोकनिवासी

**शब्दार्थ :** १. बाग, २. सीता, ३. वर जावयाचे सामर्थ्य, ४. बरोबर रीतीने, ५. निर्माण करतो, ६. वानरा, ७. यज्ञ, ८. मेले, ९. गाईच्या संरक्षणासाठी, १०. जेऊ घातले, ११. लोकांची निंदा करण्याविषयी, १२. परस्त्रीच्या ठिकाणी

॥९८॥ ऐसी सत्यलोकींची स्थिती । तेथील ब्रह्मा अधिपती। ब्रह्मसृष्टि याहीवरती । नाहीं निश्चितीं महावीरा॥९९॥ रावण पौलस्तीचा सुतु । तो होय ब्रह्मयाचा नातु । असेल सत्यलोकाआंतु । सीतासम वेतु राहिला ॥१००॥

इंदिरावर सरोवर : पहावा इंदिरावरसरोवरीं। कां सामसोमावनवृक्षांतरी। ऐक त्या ठायाची थोरी । चराचरी अनुपम्य ॥१॥ इंदिरावरसरोवरीं करितां स्नान। सर्व रसांची गोडी जाण। सर्वांगीं पाविजे आपण। अमृतपान तें फिकें ॥२॥ तेथें घडलिया सभाग्य स्नान। अगाध गोडी पावे पूर्ण। सीतासमवेत रावण। तेथें आपण गिंवसावा॥३॥ सामसोमवृक्षच्छायेसीं । बैसल्या विश्रांति होय कैसी । सुषुप्तिसुख तेथींची दासी। स्वर्गसुख त्यासी कुरवंडी[१] ॥४॥ ते छायेच्या सुखासाठीं। पुण्य वेंचिती कोट्यनुकोटी । तरी त्या छायेची नव्हेचि भेटी। त्यांसी अगम्य गोष्टी पावावया ॥५॥ पुण्य करोनि कडोविकडीं । सत्यलोका येती बापुडीं। त्यांसी न लाभे ही गोही। ते पुण्यजोडी दुर्लभ ॥६॥ जांवयासवें आलें घोडें । दाणा देती करबाडें[२]। परी त्या पक्कान्न न जोडे। तेणें पाडें साधका ॥७॥ शोधित सत्वाची परवडी । गाळींव पुण्याच्या कोडी । तैं पाविजे तेथींची थडी । अगाध गोडी त्या ठायीं ॥८॥

नामस्मरणमहिमा : त्या ठायाचें समाधान । समाधिसुखासमान। न करितां भगवद्भजन। पुनरागमन तेथें नाहीं ॥९॥ यालागीं करितां भगवद्भक्ती । चारी मुक्ती दासी होती। श्रीरामनामाही परती । साधनशक्ती असेना ॥११०॥ पहा पां कैसे अभागी जन । सांडोनियां श्रीरामस्मरण । करितां आन आन साधन। जन्ममरण सोडीना ॥११॥ नामापासीं साधनशक्ती । नामस्मरणा मुख्य भक्ती । भक्तीपासीं चारी मुक्ती । वेदशास्त्रार्थी निश्चित ॥१२॥ श्रीरामास्मरणें मुख्य भक्ती । साधु संत स्वयें जाणती। तेंचि अनुवादावे[३] किती । कथासंगती अवधारा ॥१३॥ सामसोमवृक्षमेळीं। समवेत जनकबाळीं। रावण गिंवसावा महाबळीं । छायेतळीं उपविष्ट[४] ॥१४॥

शिवलोक, कैलास : तेथेंही नसल्या रावणासी। तरी पहावें कैलासीं। शिवभक्ती आहे त्यांसीं। शिवलोकासीं शोधावा ॥१५॥ जावया शिवलोकाप्रती। म्हणाल आम्हां नाहीं शक्ती । रामनामाच्या आवर्ती[५]। सुलभ प्राप्ती शिवलोका॥१६॥ शिव श्रीरामभक्त संपूर्ण । ऐकोनि श्रीरामस्मरण। स्वयें सामोरा येईल आपण। अति सन्मान नामास ॥१७॥ शिव सन्मानी रामासी । नाम स्मरावें अहर्निशीं । सुलभ प्राप्ति नामापासीं । शिवलोकासीं जावया ॥१८॥

वैकुंठ-कैलास, शेषशाई प्रलयांत : वैकुंठ कैलासवृत्तांत । वेदशास्त्रां अगम्य मात। ते मी सांगेन साद्यंत । सीताशुद्ध्यर्थ साधावया ॥१९॥ सप्तावरणांहूनि बाहेरी । मायावरणाभीतरीं वैकुंठकैलासाची थोरी। स्वलीला करी श्रीभगवंत॥१२०॥ प्रळय होती ब्रह्मसृष्टीसीं। वैकुंठकैलासशेषशायीसीं। प्रळयो नाहीं या तिहींसी। बोलिला ऋषि याज्ञवल्क्य॥२१॥

पाच प्रकारचे प्रळय : तरी ते तिन्ही प्रळयातीत । म्हणों नये गा निश्चित। अत्यंत प्रळयीं प्रळय होत । प्रळय प्राप्त तैं त्यांसी॥२२॥ ऐसे प्रळय आहेत किती । पुसावें ऐसें वाये चित्तीं। तरी ते सांगेन संकळितीं । सावधवृत्तीं अवधारा ॥२३॥ पहिला जाण नित्यप्रळय। दुसरा तो मरणप्रळय । तिसरा दैनंदिनप्रळय । ब्रह्मप्रळय तो चवथा॥२४॥ पांचवा प्रळय आत्यंतिक । त्यासी नेणती कोणी लोक। त्याही पांचांचा विवेक । ऐका निष्टंक सांगेन ॥२५॥

त्यांचे प्रकार : नित्यप्रळय तो सुषुप्ती[६]। मरणप्रळय होतां मरती । ब्रह्मयाच्या दिनांतीं। महाप्रळयो दैनंदिन।॥२६॥ विरोनियां सप्तावरण। ब्रह्मांड विरे गा संपूर्ण । सृष्टिकर्ता[७] मरे आपण । ब्रह्मप्रळय जाण हा चवथा ॥२७॥

---

शब्दार्थ : १. ओंवाळणी करी, २. कडबा, ३. सांगावे, ४. बसलेला, ५. सतत, क्रमाने, ६. गाढ निद्रा, ७. हिरण्यगर्भ, ब्रह्मदेव.

आत्यंतिक प्रळय : आत्यंतिक प्रळयाची गोष्टी। लोक न देखती दृष्टीं। तो तंव ब्रह्मज्ञानाच्या पोटीं। गुरुवाक्ये उठी लखलखित ॥२८॥ बाप गुरुवाक्याची दृष्टी। सान थोर सूमळ निवटी[1]। कैंचा देव कैंची सृष्टी। नळी निमटीं जीवशिवां ॥२९॥ ज्ञेय ज्ञान ध्येय ध्यान। दृष्य द्रष्टा आणि दर्शन। त्रिगुणत्रिपुटीनिर्दळण। ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥१३०॥ जेथें जीवशिवत्वा नांही। कैचें वैकुंठ कैलास शेषशायी। मींतूपण मुळींच नाहीं। ब्रह्म पाहीं परिपूर्ण ॥३१॥ विरे वैकुंठेसीं नारायण। विरे शेषेसीं शेषशयन[2]। कैलासेंसीं त्रिनयन[3]। जाय विरोन परब्रह्मीं ॥३२॥ गुरुवाक्याचेनि बोलें। अत्यंतप्रळयाचें रूप केलें। ब्रह्मचि एक एकलें। असे कोंदलें परिपूर्ण ॥३३॥

राम-सुग्रीव यांची एकात्मता : ऐकतां सुग्रीवाची गोष्टी। श्रीराम सुखावला पोटीं। हर्षे दोघां पडली मिंठी। सुखसंतुष्टी स्वानंदें ॥३४॥ सुग्रीवा नाठवे वानरपण। श्रीरामा नाठवे रामपण। ऐक्य देखतां संपूर्ण। सुखीं लक्ष्मण विराला ॥३५॥ एक पडतांचि मिठी। तिघांचि विराली त्रिपुटी[4]। हर्षे कोंदलीसे सृष्टी। सुखसंतुष्टी श्रीराम ॥३६॥ अत्यंतप्रळयींचे परिपूर्ण। स्वयें श्रीरामचि जाण। संमुख देखतांही सगुण। ब्रह्म परिपूर्ण श्रीराम ॥३७॥ सीताशुद्धीची व्युत्पत्ती[5]। शुद्धब्रह्म श्रीरघुपती। वानरां जाली पूर्ण ब्रह्मप्राप्ती। सुख सर्वार्थीं श्रीराम ॥३८॥ श्रीरामाच्या निजसंगतीं। वानरां पूर्ण ब्रह्मप्राप्ती। बाप[6] सत्संगाची ख्याती। निंद्य तें होती अति वंद्य ॥३९॥ एकाजनार्दना शरण। श्रीराम कारणा कारण। रामें रम्य रामायण। नामस्मरण तारक ॥१४०॥ नामें अहल्याउद्धरण। नामें गणिका[7] अति पावन। नामें भुक्ति मुक्ति पूर्ण। श्रीरामस्मरण परब्रह्म ॥४१॥ श्रीराम सगुण दिसे पाहीं। परी तों देहचिं विदेही। दीनोद्धारालागीं पाहीं। वना निजपायीं स्वयें जाला ॥४२॥ जो देवां दुर्लभ नमस्कारा। जो न कळे वेदशास्त्रां। तो सखा जाला वानरां। रामें वनचरां उद्धरिलें ॥४३॥ एकाजनार्दना शरण। श्रीराम दीनोद्धारण। नामें तरती दीन जन। नामें छेदन भवबंधा ॥४४॥ श्रीरामनामापरतें। आन साधन नाहीं सरतें। एका शरण श्रोतियांतें। श्रीरामकथेतें अवधारा ॥४५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सीताशुद्ध्यर्थवानरप्रेरणं नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ ॥ओंव्या ॥१४५॥श्लोक ॥२॥ एवं ॥१४७॥

## अध्याय बारावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### सीताशोधासाठी वानरांचे प्रयाण

तिन्ही दिशांकडे वानरांना पाठविल्यावर दक्षिण दिशेकडे महापराक्रमी निवडक वीरांना पाठविले : नाना स्थानें स्वर्गवासीं। तेथें शोधावया सीतेसी। सुग्रीवें सांगोनि तारापासीं। वेगीं तो स्वर्गासी धाडिला ॥१॥ पूर्व पश्चिम उत्तर। स्वर्ग पाताळा धाडिले वीर। दक्षिणदिशेचा विचार। सांगों कपीश्वर विसरला ॥२॥ ऐसें न म्हणावें श्रोतीं। दक्षिणदिशेची गती। आहे सीतेची निजप्राप्ती। गोड ग्रासार्थी राखिली ॥३॥ गोड ग्रास तो रामायणांत। तो हा सीताशुद्धीचा ग्रंथ। ख्याति करील हनुमंत। लंकेआंत तें ऐका ॥४॥ दक्षिणदिशेचा विचार। सीताप्राप्तींचे मुख्य घर। तेथें धाडिले महाशूर। वीर दिनकरप्रतापी[8] ॥५॥

पितामहसुतं चैव जांबवंतं महाबलम्। नीलमग्निसुतं चैव हनूमंतं च वानरम् ॥१॥
गजं गवाक्षं गवयं सुपेणं वृषभं तथा। मदं च द्विविदं चैव सुषेण गंधमादनम् ॥२॥

शब्दार्थ : १. नाश करी, २. श्रीविष्णु, ३. शंकर, ४. ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान ही तीन, ५. ज्ञान, ६. मोठी, ७. पिंगला, ८. सूर्यासारखे पराक्रमी.

अंगदप्रमुखान्वीरान्वीरः कपिगणेश्वरः । विधाय हरिवीराणामादिशद्दक्षिणां दिशम् ॥३॥

जांबवंत, नल, नील वगैरे वीर व अंगद यांची नियुक्ती झाल्यामुळे त्यांना आनंद झाला : ब्रह्मयाचा निजसुत। जो रिसांचा[१] निजनाथ। महाबळी जांबवंत । दक्षिणशुद्ध्यर्थ नेमिला ॥६॥ नीळ सेनानी[२] अग्निपुत्र। नळ विश्वकर्म्याचा कुमर। गज गवाक्ष शरभ वीर। वानरभार दक्षिणे ॥७॥ मैंद आणि द्विविद । दोघे वीर अति प्रसिद्ध । त्यांमाजी युवराज अंगद । सैन्य सन्नद्ध[३] त्या अधीन ॥८॥ अंगद राजा महावीर। सर्वे सेनानी श्रेष्ठ वानर । दक्षिण शोधावया सत्वर। केला भुभुःकार वानरीं॥९॥ पूर्व पश्चिम उत्तर । निघती जे जे वानरवीर। तिहीं केला भुभुःकार । नादें अंबर दुमदुमिलें ॥१०॥ नाद कोंदला उद्भट। ध्यानीं गजबजिला नीलकंठ । होऊं पाहे ब्रह्मांडस्फोट[४]। भय दुर्घट कळिकाळा ॥११॥

परंतु त्यात मारुतीचा सामवेश न झाल्याने तो कष्टी झाला : जातां देखोनि वानर। हनुमंतासी चिंता थोर। मज नाठवीच सुग्रीव वीर। श्रीरामचंद्र विसरला ॥१२॥ सीताशुद्धीचा कार्यार्थ । जैं मज आजी नव्हेचि प्राप्त । तै माझें व्यर्थ जीवित। धिक् पुरुषार्थ पैं माझा ॥१३॥ जातां वानरांचे पाळे[५]। हनूमाना पिटी निजकपाळें। अदृष्टें घेतलें ये वेळे। दुःखें लोळे गडबडां ॥१४॥ वानर जातां पैं देखोन। हनुमंतासी आलें रुदन। ते जाणोनि श्रीरघुनंदन । होय हांसोन बोलता ॥१५॥ हनुमंताची तीव्र व्यथा। कळों सरली श्रीरघुनाथा । तो श्रीराम अंतर्यामी जाणता । होय सांगता सुग्रीवा ॥१६॥

हे पाहून मारुतीस पाठविण्याचे श्रीराम सुचवितात : सीताशुद्धीचा कार्यार्थ । मुख्य साधक हनुमंत। त्याचें अंगीं अति पुरुषार्थ। त्यासी हा अर्थ सांगावा ॥१७॥ ऐसें बोलतां श्रीरघुनाथा। सुग्रीवें चरणीं ठेविला माथा। मी विसरलो हनुमंता । धन्य जाणता श्रीराम ॥१८॥ ऐसें सांगतां श्रीरघुनाथा । उल्लास सुग्रीवाच्या चित्ता। पाचारोनियां हनुमंता। होय सांगता उल्लासें॥१९॥

विशेषेण तु सुग्रीवो हनूमन्तमुवाच ह । स हि तस्मिन्हरिश्रेष्ठे संभावयति विक्रमम् ॥४॥
न भूमौ नान्तरिक्षे वा नाम्बरे नामरालये । नाप्सु वा गतिसंगं ते पश्यामि हरिपुंगव ॥५॥

सुग्रीव हनुमंतास पाचारण करितो : सुग्रीव म्हणे हनुमंता । सीताशुद्धीच्या कार्यार्था । तुवां निघावें शीघ्रता । श्रीरघुनाथा सुखार्थ ॥२०॥ तुवां जावोनि तत्वतां । सीताशुद्धि आणावी आतां। तुझिया ज्ञानबळा समता । नाहीं सर्वथा तिहीं लोंकीं॥२१॥ देव दानव मानव दैत्यां । तुझिया बळा नाहीं समता। जळस्थळखेचरभूतां[६]। तुजसीं समतां[७] असेंना ॥२२॥ यालागीं सवेग आपण । शीघ्र करावें गमन । करितां हनुमंते उड्डान । धरी धांवोनि सुग्रीव ॥२३॥ तूं एकला शीघ्र जासी । सीता शुद्धि घेवोनि येसी । हें मानलें आम्हांसी । निश्चयेंसी हनुमंता ॥२४॥ अंगीकारोनी युवरायासी । यश द्यावे अंगदासी । त्यासी न्यावें सीताशुद्धीसीं। हें मी तुजपासीं मागतों।॥२५॥ ऐकोनि सुग्रीवाचें वचन । हनुमंते केलें नमन । तूं राजा मी तुझ्या अधीन। आज्ञा प्रमाण मज पूज्य॥२६॥ सुग्रीवें आणोनि अंगदासी। स्वयें दिधला हनुमंतापासीं । वंदोनियां युवराजासी । निघे शुद्धीसी हनुमंत ॥२७॥ वानर धाडिले शुद्धीसी। निघाले नेमिल्या दिशेसी। चहूं दिशांच्या गतिमानांसी । सुग्रीव त्यांपासीं सांगत ॥२८॥

पूर्वां तु दिशमास्थाय विनतः प्लवगर्षभः । प्रतस्थे हरिशार्दूलो वानरैर्बहुभिर्वृतः ॥६॥

पूर्वदिशेला पाठविलेल्या वानरांना सुग्रीव कल्पना देतोः वीरशार्दूळ वानरपती। पूर्वे शोधावयाच्या अर्थीं । साक्षेपें सांगे विनीतांप्रती[८] । गमनस्थिती ते ऐका ॥२९॥ पूर्वे जातां

---

शब्दार्थ : १. अस्वलांचा, २. सेनापती, ३. तयार, ४. ब्रह्मांडाचे विदारण, ५. समूह, ६. जलवासी, स्थलवासी व आकाशवासी प्राण्यांना, ७. बरोबरी, ८. नम्र अशा वानरांस.

महावीरीं। शुद्धि घ्यावी नानापरी। पहावी देशदेशांतरीं। गिरिशिखरीं ते ऐका ॥३०॥ मंदराचळ अरुणाचळ । मुख्य शोधावा कुलाचळ । पूर्वे पर्वत सकळ । शिखरें शैल शोधावे ॥३१॥ अंग वंग कारुष कलिंग । गौड विदेह पौंड्र भृंग । कामरूप कामाक्ष देश अनेग । समूळ सांग शोधावे ॥३२॥ मंदगिरीच्या एके भागीं । लोक वसती पापमार्गी। ऐका त्यांचिही महामांगी। विकटांगी विक्राळ॥३३॥ कर्ण प्रावरण विकर्ण एक । बर्बर खरमुख[1] घोडमुख। हबसी किरात नर्दनाळिक। काळमुख महायवन ॥३४॥ कोळी माळी निषाद हूण। केशकंबळी केशावरण । लोमधारी लोमप्रावरण । विकराळवदन विकटाक्ष ॥३५॥ ऐशां पापियांमाजि जाण । असेल महापापी रावण । तेथें शोधावें आपण। सौभाग्यरत्न सीतेसी ॥३६॥ जळवासी जळमाणसें । आरक्तवर्ण अति कर्कशें। रूमशाम फिरंगवेशें । सागरप्रदेश शोधावा ॥३७॥ मधु मर्दिला मुरारीं । रक्त भरिलें सागरीं । त्या लोहसमुद्राच्या तीरीं। रत्नगिरी पर्वत॥३८॥ तेथें गरुडाची नित्य वस्तीं। तेणें गांजोनि लंकापती । सोडवोनि सीता सती। रामार्पणार्थी प्रतिपाळी॥३९॥ तेथें जावोनि आपण। घ्यावें गरुडाचें दर्शन। सीता पुसावी करोनि नमन। नाहीं तरी गमन पुढें करावें ॥४०॥ त्याचि सागरामाझारीं । गोमंतनामें पर्वत थोरी । उंच लक्ष योजनांतरीं । वस्ती त्यावरी मंदेहां ॥४१॥ मंदेहराक्षसांची थोरी । असंख्य उपजती सागरीं । सूर्यादयी सूर्यावरी। शसहस्त्रीं धांवती॥४२॥ तें द्विजसंध्योदकेंकरीं[2]। पडोनि निमती सागरीं । सवेंचि उपजती रात्रीं । लक्षांतरीं असंख्य ॥४३॥ धन्य द्विजांचे अर्घ्यदान । संध्योदकें दुष्टदलन। सूर्यासी करवी गमन । मार्गदान द्विजसंध्या ॥४४॥ यालागीं सूर्याची नित्यगती। आहे ब्राह्मणांच्या हातीं । ब्राह्मणमहिमा वानूं किती। भुक्ती मुक्ती चरणतीर्थी॥४५॥ ब्राह्मणांच्या सेवावृत्तीं । तेथें तुम्हां होईल गती । सीता शोधावी सावधवृत्तीं । श्रीरामभक्तिप्रतापें ॥४६॥ वालखिल्य तेचि पर्वतीं। अंगुष्ठमात्र देहाकृती । वैखानस त्यांसी म्हणती। सामर्थ्यशक्ती अनिवार॥४७॥ त्यांच्या अनुवृत्तीं आपण। साष्टांग करोनि नमन। त्यांसी सांगावें निजगमन। सीताशोधन करावें॥४८॥ पूर्वे जगन्नाथ स्थळ । उदार ब्रह्ममूर्ति मंगळ। तेथींचा महिमा अति प्रबळ। ऐका सकळ सद्भावें॥४९॥ ब्रह्मभावो आणि चिच्छक्ती। मूर्तिमंत तिन्ही मूर्तीं। कृष्ण बळभद्र सुभद्रापती। लोक वंदिती पर्यायें[3]॥५०॥ प्रथम शक्तीचे दर्शन । तो नर होय सभाग्य पूर्ण। प्रथम बळभद्राचें दर्शन । धर्मपरायण तो पुरुष॥५१॥ प्रथम देखिल्या भगवन्मूर्तीं । त्यासी सद्य[4] भगवत्प्राप्ती। पायां लागती चारी मुक्ती । भुक्ति मुक्ति त्या आंदण्या ॥५२॥ तेथें जावोनि आपण। करावें देवदर्शन । सीता शोधावी सावधान। नाहीं तरी गमन करावें ॥५३॥ कोणे एके अवसरीं । स्वभावें कोप आला हरी। तो निक्षेपिला सागरीं। अग्नि समुद्रीं लागला ॥५४॥ जळचरां परम दुःख । कढों लागलें समुद्रोदक । कृपा उपजोनि देख । कोपानुकंप रचियेला॥५५॥ दाहक[5] दीप्ति[5] काढोनि बाहरी। त्याचा रचिला कनकगिरी। उरला जो कां सागरोदरीं । त्याची थोरी वडवाग्नि ॥५६॥ वडवानळासी भक्ष्य देख। बारा गांवें समुद्रोदक। सभोंवतें देखोनि चोख। ठेविला निष्टक सागरीं॥५७॥ सागरू आपल्या जळसत्ता । विझवूं न शकें त्यासी सर्वथा। सागरा शोषोनि समस्ता। होय भक्षिता प्रलयकाळीं॥५८॥ तेथोनि उडतां महावीरीं। जळती वडवाग्निमाझारीं। वाट न चले पुढारीं। शीघ्र वानरीं परतावें ॥५९॥

पश्चिमां तु दिशं घोरां सुषेणः प्लवगैः सह । प्रतस्थे कपिशार्दूलो दिशं वरुणपालिताम् ॥७॥

पश्चिम दिशेकडे : सुग्रीव वीरपंचानन। पाचारोनियां सुषेण। पश्चिम दिशेचें शोधन। सांगे आपण तें ऐका ॥६०॥ सौराष्ट्र सिद्ध सौवीर । उखामंडळ द्वारकापुर । त्रिगर्त गांधार

---

शब्दार्थ : १. गाढवाच्या तोंडाचे, २. ब्राह्मणांच्या संध्येच्या पाण्याने, ३. अनुक्रमाने, ४. तत्कार, ५. जाळणारे तेज.

काश्मीर । देश समग्र शोधावे ॥६१॥ महा मेधावती साबरमती । रेवा मधुमती वेदवती । पंचनद प्राची सरस्वती । पृथोदकाप्रती पहावी सीता ॥६२॥ कुरुक्षेत्र गीतावट । ज्वालामुखी नगरकोट। नेपाळ जयपाळ नीळकंठ । काश्मीरघाट शोधावे ॥६३॥ केतकीखंड शंखनाळवन। केशरउत्पत्ति सुगंधस्थान। जांगळादेवी पीतवन। सीता शोधून पहावी॥६४॥ प्राग्ज्योतिषनाम नगर। हेममय मनोहर। महादुष्ट वसे नरकासुर। त्यासी नित्य मित्रत्व रावणासीं॥६५॥ त्याचेनि बळें रावण तेथ । असेल सीतासमवेत। तो शोधोनि धरावा जीत । बांधोनि येथ आणावा ॥६६॥ सागरीं मधुकैटभस्थान । त्या नांव दशावर्त जाण । तेथें मधुमर्दी मधुसूदन । तें विजयस्थान हरीचें ॥६७॥ तेथेंचि पंचजन[1] वधून । शंख काढिला पांचजन्य[2]। ज्याचेनि नादें त्रिभुवन। कंपायमान सुरासुर॥६८॥ तेचि समुद्रीं चक्रगिरी। वज्रनामी वज्रशरीरी । नित्य वसे तयावरी । सुरासुरीं दुर्धर्ष[3] ॥६९॥ त्यातें वधोनि चक्रधर । त्याच्या शरीराचें करी चक्र । आणि इंद्रालागोनि वज्र । निर्मी मयासुर लघुलाघव ॥७०॥ ऐसें अति दुर्गम स्थान । रामानामें रिघोनि जाण। शुद्धि करोनियां सावधान । जीत[4] रावण धरावा ॥६१॥ याहीपुढें अस्तगिरी । सूर्य मावळे सचक्री । पुढें मार्ग न चले अंधारीं । शीघ्र वानरीं परतावें॥७२॥

उत्तरां तु दिशं दिव्यां गिरिजालसमावृताम् । वीरः शतबलिर्नाम प्रययौ स पदानुगः ॥८॥

उत्तर दिशेकडे : उत्तरदिशे गिरि जांगळी । शोधूं निघाला शतबळी। सुग्रीव सांगे त्याजवळी । देश देश शोधावा॥७३॥ मद्रक मथुरा शूरसेन। कुरु कैकेय माळव मान । मत्स्य पुलिंदादि यवन। चीन महाचीन शोधावे॥७४॥ उत्तरकुरुदेशाच्या ठायीं। शीतोष्णबाधा न बाधी पाहीं । जरा रोग शीक नाहीं । नाहीं ते ठायीं तस्कर॥७५॥ त्या त्या देशांमाजी जाण । सीतासवेत रावण। अवश्य शोधावा आपण । सावधान समस्तीं ॥७६॥ मेरु मांदार सोम हेमाद्री । भृंग तुंग भ्रमरगिरी। क्रौंच कालिंजर यांवरी । सीता सुंदरी शोधावी ॥७७॥ सुगंध सुरभि पीत पलाक्ष । देवदारु तरु तरक्ष । भूर्जपत्र वल्कलवृक्ष । सीता समक्ष शोधावी ॥७८॥ गंगा यमुना सरस्वती। तमसा कौशिकी गोमती । प्रयागतीर्थमहाराजख्याती । तेथ सीता सती शोधावी ॥७९॥ मानसरोवराचे ठायीं । जे जन्मली निजप्रवाहीं। शरयू तिचें नाम पाहीं। सीता ते ठायी शोधावी॥८०॥ नारायणाचें निजमंदिर। बदरिकाश्रम अति पवित्र। पंचप्रयागादि केदार। सीता सुंदर शोधावी॥८१॥ कनकगिरिशिखरीं देख। कृत्तिकागर्भी स्वामी कार्तिक । शरबिल्वींचें वीर्योदक । जन्म षण्मुख[5] पावला॥८२॥ ते पर्वतीं अति एकांत। रावण सीतासमवेत। शोधून पहावा निश्चित । तुम्ही समस्त मिळोनी ॥८३॥ मानस सरोवराचा प्रांत । मेरुपाठारीं अति शोभित । सीता शोधावी तेथ तेथ । तुम्ही बळवंत वानर ॥८४॥ तेथोनि पुढें हिमाचळ। वाट न चले हिमकल्लोळ[6]। तेथोनि परतावें तत्काळ । हिमें प्रबळ पीडाल ॥८५॥

तारांगदाभ्यां सहितः प्लवंगः पवनात्मजः । अगस्तिसेवितामाशां प्रतस्थे हनुमान्कपिः ॥९॥

दक्षिण दिशेकडे : अंगद युवराज कुमर । नळ नीळ जांबवंत दुर्धर। दक्षिण शोधावया सत्वर । हनुमान वीर चालिला ॥८६॥ दक्षिण शोधावयाचे अर्थीं । सुग्रीव सांगे तयांप्रती । किती पर्वत देश किती । शोधित स्थिती अवधारा॥८७॥ विंध्याद्रि सिंहाद्रि मलयाद्री। मतंग श्रीशैल अंतरगिरी। आणि वेंकटाद्री चंद्रगिरी । सीता महेंद्रीं शोधावी ॥८८॥ नर्मदा तपती गोदावरी। कृष्णा वेण्या मलप्रहारी । पातालगंगेच्या प्रसरीं[7]। सीता सुंदरी शोधावी॥८९॥ अहोबळ महोबळ धूतशंकरीं । पांडुरंगमहाक्षेत्रीं । वेणुनाद भीमातीरीं । सीता सुंदरी शोधावी

शब्दार्थ : १. या नावाचा दैत्य, २. विष्णूच्या हातांतील शंखाचे नाव, ३. देवांना व असुरांनाही अजिंक्य, ४. जिवंत, ५. कार्तिकस्वामी, ६. अत्यंत थंडी, ७. समीपप्रदेशी.

॥९०॥ प्रतीची मैना ताम्रपर्णी। कृतमाला पयस्विनी। उभयकावेरी श्रीरंगस्थानीं। श्रीरामपत्नी शोधावी॥९१॥ अगस्त्याश्रम कन्याकुमारी। मत्स्यतीर्थ चिदंबरी। कर्दळीविन मंगळागौरी। सीता सुंदरी शोधावी ॥९२॥ कर्णाटक तेलंगत्रिगुळांतरीं। ओढ्यामल्याळ पंचभर्तारी। चोरमंडळामाझारी। सीता सुंदरी शोधावी ॥९३॥ पांचाळ देश मथुरामान। अति रमणीय कुमुदवन। चंद्रहास्य गुप्तार्जुन। सीता शोधून पहावी॥९४॥ अहोबळाद्रि नृसिंहस्थान। चौक मथुरा दारुकवन। अनंतशयन कुंभकोण। श्रीरंगपट्टण शोधावें ॥९५॥ तेथोनि पुढें लंकापुर। राक्षस वसती महशूर[1]। आडवा दुस्तर सागर। जावों वानर न शकती॥९६॥ दक्षिणे सीताप्राप्तिस्थान। म्यां सांगीतलें स्थूळमान। तुम्हीं अवघे बळवाहन। सीता शोधून आणावी ॥९७॥ नळ नीळ प्राज्ञ जांबुवंत। आतुर्बळी वीर हनुमंत। अंगद राजसुत तुम्हांआंत। सीताशुद्ध्यर्थ साधावया ॥९८॥ सीताशुद्धी आणिल्या देख। माझें श्रीरामीं सरतें[2] मुख। तेणें श्रीरामा अति संतोषसुख। हें आवश्यक साधावें ॥९९॥ पालव[3] पसरोनि तुम्हांसी। मी मागतों अवघियांसी। आणोनि सीतेच्या शुद्धीसी। श्रीरामासी सुख द्यावें ॥१००॥ सुखी केलिया श्रीरघुनाथा। परम सुख आम्हां समस्तां। सीताशुद्धीसी शीघ्रता। वदे वरदार्था सुग्रीव ॥१॥

यो मां निवृत्तो मासांते दृष्टा सीतेति वक्ष्यति। मम तुल्यफलं राज्यं संप्राप्तश्च भविष्यति ॥१०॥
एवमेतद्विचेतव्यं भवद्भिर्वानरोत्तमैः। तदुग्रशासनं भर्तुर्विज्ञान हरिपुंगवाः ॥११॥

सीतेचा शोध करील त्याचा सत्कार व बक्षीस : तुम्हांमधून भलता। यथार्थशुद्धि सांगे सीता। मजसमान राज्यसत्ता। नृपपूज्यता मी देईन ॥२॥ मुगुट कुंडलें कटिसूत्र। कंठीं पदक विचित्र हार। श्वेतच्छत्र युग्मचामर। राज्यधर करिन मी ॥३॥ सीताशुद्धि जो सांगता। परम आप्त श्रीरघुनाथा। भुक्तिमुक्तिंचा तो दाता। एकात्मता आलिंगी ॥४॥ अंतरीं आलिंगी एकात्मता। बाह्य स्थापी देवभक्तता। राज्यवैभव नित्यामुक्तता। शुद्धि सांगतां हे प्राप्ती॥५॥ सीताशुद्धीच्या यथार्थी। प्राण्या आहे परम प्राप्ती। माझेनि भुक्ती श्रीरामें मुक्तीं। जाणा निश्चितीं समग्र ॥६॥ सीताशुद्धीचें यथार्थी। भुक्ति मुक्ति परम गती। संतोषोनि दे श्रीरघुपती। येवढी प्राप्ती शुद्ध्यर्थी ॥७॥ ऐसें बोलतां सुग्रीवासीं। उल्लास आला वानरांसी। शुद्धिमर्यादा कैसी कैसी। आम्हांपासीं सांगावी ॥८॥

शोध करण्याची कालमर्यादा एक महिना : सुग्रीव सांगे आपण। म्यां सांगितलें जें जें स्थान। तें तें शोधून सावधान। यावें आपण मासें एकें ॥९॥

यापेक्षा अधिक काळ लागल्यास त्यासाठी शिक्षा जाहीर : जो राहील मासावरता। त्यासी मी दंडीन तत्वतां। त्याच्या करीन जीवघाता। दंडनवार्ता ते ऐका ॥१०॥ श्रीरामभजनीं विलंबन। विषयीं लोलुप्त संपूर्ण। त्याचे मस्तकामूत्रें वपन। काळें वदन पैं त्याचें ॥११॥ उपानहमाळा[4] पूर्ण। त्यासी करीन रासभारोहण[5]। गोमयसुमनीं[6] वर्षती जन। देहदंडन विलंबिया॥१२॥ श्रीरामभजनीं करितां आळस। ऐसा पावाल सायास। यालागीं धरोनि आयास[7]। रामकार्यास निघावें ॥१३॥ ऐकोनि सुग्रीवाचें वचन। वानरीं केलें शीघ्र गमन। स्वस्वदिशेप्रती वानरगण। गिरा गर्जोन निघाले ॥१४॥

स्वां स्वां दिशमभिप्रेत्य त्वरिताः संप्रतस्थिरे। नदंतश्चोन्नदंतश्च गर्जतश्च प्लवंगमाः ॥१२॥
प्रतिज्ञांचक्रिरे वीराः प्लवंगास्ते महौजसः। आनयिष्यामहे सीतां हनिष्यामश्च रावणम् ॥१३॥
अहमेको हनिष्यामि प्राप्तं रावणमाहवे। ततश्चोन्मथ्य सहसा हरिष्ये जनकात्मजाम् ॥१४॥

वानरांचे प्रयाण व त्यांचा उत्साह : ऐकोनि सुग्रीववचन। वानरीं केलें नर्दन[8]। स्वास्वा[9]

शब्दार्थ : १. प्रसिद्ध, २. मान्य, ३. पदर, ४. जोड्यांच्या रांगा, ५. गाढवावर बसवणे, ६. शेणाच्या फुलांनी, ७. प्रयत्न, ८. गर्जना, ९. आपापल्या.

दिशाप्रति गमन । गिरा गर्जोन निघाले ॥१५॥ वानरीं केला भुभुःकार । दुमदुमिलें चराचर । प्रतिज्ञा बोलती वीर । दशशिरग्रहणार्थ ॥१६॥ कळिकाळाचें तोंड फोडून । आम्ही जानकी आणूं हिरोन । रावण बापुडें तें कोण । देखिल्या प्राण घेवोनि ॥१७॥ एक प्रतिज्ञा बोले पूर्ण । युद्धीं मिळाल्या रावण । जेवी गज विभांडी पंचानन[1] । तेंवी दशानन आणीन ।१८॥ एक प्रतिज्ञा बोले वानर । युद्धीं मिनल्या दशशिर । जेंवी मूषक धरी मार्जार । तेंव दशवक्त्र आणीन॥१९॥ एकाची प्रतिज्ञा दारुण । जेंवी पारधी बांधी हरिण । तेंवी बांधोनि रावण । येथें आणीन श्रीरामा ॥२०॥ जेंवी चिडीमार[2] आपण । चिंचात[3] चिडी घरी जाण। तेंवी चिंचात रावण । जेंवी येथें आणीन सीतेसीं॥२१॥ जेंवी गळीं गिळिजे मासा। तेंवी पुच्छीं बांधोनि लंकेशा । येथें आणीन राघवेशा । माझा भरंवसा तुम्ही माना ॥२२॥ जेंवी पारध्याचें श्वान[4] । आणीच गळां बांधोन । तेंवी आणीन दशानन । सत्य वचन श्रीरामा।।२३॥ जेंवी हुरड्याचें लोंबट । बळें रगडी कुणबट । तेंवी रावणाचे दाही कंठ । निमटोनि यथेष्ट आणीन ॥२४॥ ऐसी नानापरी प्रतिज्ञा करिती । रावण धरून मारूं म्हणती । हे ऐकोनि श्रीरघुपती। परम चित्तीं आनंद ॥२५॥ ऐकोनि वानरांचें वचन । श्रीराम हांसे खदखदून । लक्ष्मण हांसे हे गिरा गर्जून । बळवाहन वानर ।२६॥ वंदोनि श्रीरामाचे चरण । सीताशुद्धीलागीं जाण। वानरीं केलें उड्डाण । चालिले गगन व्यापूनी ।२७॥ जेंवी शलभ[5] आकाशीं । तेंवी वानर चौपांसीं । धाविन्नले दशदिशांसी । सीताशुद्धीसी साधावया ॥२८॥

दक्षिणेकडील सैन्यांत अंगद पुढारी, त्याच्या आज्ञेने मारुती श्रीरामांच्या दर्शनास जातो : दक्षिण शोधावया सत्वर। अंगद चालिला महावीर। सवे वानर अति दुर्धर। सहपरिवार निघाला ॥२९॥ हनुमंत विनवी अंगदासी । पुसों चुकलों श्रीरामासी। वेगीं वंदोनियां त्यासी। मी तुजपासीं येईन॥३०॥ सीताशुद्धी वानरगमन। तें देखोनि रघुनंदन। सुग्रीवा दिधलें आलिंगन । सुखसंपन्न सौमित्र ॥३१॥ देखोनि वानरांचें गमन। सुखी श्रीराम लक्ष्मण। एकाजनार्दना शरण । हनुमंतकथन अवधारा ॥३२॥ एकांत हनुमंत येऊन । पुसेल सीतेचें निजलक्षण। सीतावस्तींचे महिमान । रघुनंदन सांगेल ॥३३॥ एकाजनार्दनीं विनती । किष्किंधाकांडाच्या अनुवृत्तीं[6]। हनुमंताची उद्भट ख्याती । सावधान श्रोतीं परिसावी ॥३४॥ हनुमंतचरित्र आहे बहुत । परी मी अल्पमतीनें सांगत । कथा सांगविता श्रीरघुनाथ । परिपूर्ण करिता जनार्दन ॥३५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां सीताशुद्धिवानरप्रेषणं नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥ ॥ओंव्या ॥१३५॥ श्लोक ॥१४॥ एवं ॥१४९॥

## अध्याय तेरावा

॥ श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ॥

### श्रीराम-हनुमंत संवाद

सुग्रीव अंगदाला हनुमंतांच्या स्वाधीन करून त्याच्यावरच सर्व भार टाकतो : सीताशुद्धीस गेले वानर । दक्षिणेसी अंगद वीर । निघाले जी सहपरिवार । वानरवीरसमवेत ॥१॥

सह तारांगदाभ्यां तु प्रस्थितो हनुमान्कपिः। सुग्रीवेण यथोद्दिष्टं तं तु देशं दुरासदम् ॥१॥

सुग्रीवें बोलावोनि हनुमंत । हातीं दिधला वालिसुत[7] । सीताशुद्धीं रामकार्यार्थ । तुझेनि निजविजयीं ॥२॥ अंगद वीर अति विख्यात । सवे नळ नीळ जांबुवंत । वानरवीर असंख्यात ।

शब्दार्थ : १. सिंह, २. चिमणी मारणारा, ३. चीं चीं शब्द करीत, ४. कुत्रे, ५. टोळ, ६. संदर्भानें, ७. वालिपुत्र अंगद.

दुर्धर पंत दक्षिणे ॥३॥ सिद्धि न्यावया रामकार्यार्था। शुद्धि[1] साधावया सीता। मुखरण[2] करोनि हनुमंता। होय धाडिता सुग्रीव ॥४॥ सीताशुद्धि माझे माथां । सुग्रीवें ठेविली तत्वतां। तेणें उल्लास हनुमंता । श्रीरामकांता शोधावया ॥५॥

**हनुमंत श्रीरामांकडे जाण्याची अंगदाची आज्ञा मागतो :** कैसी आहे पां ते सीता। गुणलक्षणस्वरूपता। समूळीं पुसोन श्रीरघुनाथा। वनीं गिंवसितां ओळखाया ॥६॥ सद्गुरुमुखें सद्भावें । स्वरूपनिश्चय न करवे । तरी ते वस्तुप्राप्ति न होय । व्यर्थ भांवे वनवासीं ॥७॥ स्वरूपनिश्चयो न करितां । वानर पाहूं गेले सीता । त्यांसी न लभे ते सर्वथा । येतील आतां परतोनी ॥८॥ स्वरूपनिश्चय झाल्याविण । वस्तु प्राप्ति नव्हे जाण। हीन दीन खालती मान । येती परतोन अवघेही ॥९॥ वस्तुप्राप्तीविण देख। परते त्याचें काळें मुख । देव पितर त्या विमुख। एक एक त्या हासती ॥१०॥ तैसें न करावें आपण । निश्चय करोनि संपूर्ण । सर्वभूतीं सावधान। सीताचिद्रत्न शोधावें ॥११॥ ऐसें धरोनि मानसीं । हनुमंत पुसें अंगदासी । नमस्कारोनि श्रीरामासी । शीघ्र तुजपासीं येईन ॥१२॥ सुग्रीवें तुज सवें धाडितां । हर्ष ओसंडला[3] चित्ता । पुसों विसरलों श्रीरघुनाथा ॥ वंदोन आतां येईन ॥१३॥

**अंगदाची विनयवृत्ती व मारुतीची स्तुती :** एकोनि हनुमंताचें वचन । अंगदें घातलें लोटांगण। नमस्कारोनि श्रीरामचरण। शीघ्र आपण येथे यावें ॥१४॥ तुझेनि पिता वाळी निर्मुक्त। तुझेनि सुग्रीव सनाथ। तुझेनि आम्हां श्रीरघुनाथ। स्वामी संतत लाधला ॥१५॥ तुझेनि श्रीरामदर्शन। तुझेनि वानरां भवतरण। तुझेनि सुग्रीव राजासन। तुझे महिमान अगाध ॥१६॥ तूं स्वामीं आम्हां दास्य । तूं माउली आम्ही पोष्य[4] । तूं सद्गुरु आम्ही शिष्य। सत्य भाष हे माझी ॥१७॥ ऐसें असोनि तत्वतां । सेवक म्हणविसीं हनुमंता । ऐसी तुझी अगाधता। वेदशास्त्रार्था अगम्य ॥१८॥

**सर्व वानर अंगदाचे कौतुक करितात :** ऐकोनि अंगदाचें वचन । नळ नील जांबुवंत तारानंदन । अवघे घालिती लोटांगण । नमूनि चरण हनुमंताचे ॥१९॥ धन्य धन्य अंगदा तुझी वाणी । धन्य अंगदा तुझी जननी । धन्य धन्य तुझी करणी । वानरसैन्यीं तूं धन्य ॥२०॥ ऐसे वानर समस्त। अंगदाचे गुण वर्णित । हनुमंतासी शरणागत । अभिवंदित[5] दोघांसी ॥२१॥ कुमार आणि विवेकता । राजा आणि विनीतता । यथार्थवादें रसाळ वक्ता । तेणें हनुमंता आल्हाद ॥२२॥ चुंबोनि अंगदाचें वदन । हर्षें दिधलें आलिंगन । दोघां सुखसमाधान । आनंदघन श्रीराम ॥२३॥

**हनुमंताचा रामांना प्रश्न :** गहन गंभीर हनुमंत। आपला निजनिश्चितार्थ। कळों नेदीच लोकांत । पुसे गुह्यार्थ श्रीरामा ॥२४॥ ऐसें पुसोनि अंगदासी । हनुमंत आला श्रीरामापासीं। बैसोनियां एकांतासीं । सीता त्यापासीं पुसतसे ॥२५॥ गवेषितां[6] दक्षिणेसीं । सीता भेटल्या आम्हांसी । आम्हीं ओळखावी कैसी। तिच्या स्वरूपासी मज सांगें।॥२६॥ रूपरेखा ठाणमाण[7] । गुणगरिमा लक्षलावण्य । वस्ति स्थिति गति महिमान । कृपा करोनि मज सांगा ॥२७॥

**श्रीरामांचे स्पष्टीकरण :** ऐकोनि हनुमंताचें वचन। संतोषला श्रीरघुनंदन। निजशक्तीचें महिमान । निजलक्षण सांगत ॥२८॥ ऐक बापा हनुमंता। पुसो आलासी एकांता । मज तुज नाहीं भिन्नता । यथार्थ सीता सांगेन ॥२९॥

**सीतेचे रूप व गुणवत्ता :** माझें स्वरूप चैतन्य घन । सीता चिच्छक्ति संपूर्ण । सीतेंसी मज

शब्दार्थ : १. सीतेचा शोध लागावा म्हणून, २. पुढारी, मुख्य, ३. प्राप्त झाला, ४. पोसणी, लेकरे, ५. नमस्कार करीत, ६. शोधिता, ७. अंगाची ठेवण.

वेगळे पण । अणुप्रमाण असेना ॥३०॥ श्रीराम गोडी सीता साकर। श्रीराम रस सीता नीर। श्रीराम घृत सीता क्षीर । चिदचिन्मात्र श्रीरामसीता॥३१॥ मेळवितां द्रव्यांतर। अग्नि भासे द्रव्याकार । तेंवी सीता चिन्मात्र। दिसे साकार विश्वरूप ॥३२॥ नावदेचे[१] नारळ पूर्ण। कवटें काढी तो करंटा जाण । तेंवी सीता सच्चिद्धन । मनुष्यपण तीस नाहीं ॥३३॥ नारळ सर्वांगीं साकर । सीता चैतन्य साकार । तिचा इंद्रियव्यापार । चिदचिन्मात्रस्वभावें ॥३४॥ अर्धनारीनटेश्वर । दों स्वरूपीं एक शरीर । तेंवी सीता श्रीरामचंद्र । अभिन्नाकार भिन्नत्वें ॥३५॥ पुरुषभाग स्वयें लपवी। स्वइच्छा प्रकृतींतें नाचवी । प्रकृतिभाग जैं लपवी । प्रकटी पदवी पुरुषाची ॥३६॥ भ्रांति पडदा सोडितां जाण । मिथ्या प्रकृतिपुरुषभान । तेंवी सीताश्रीरघुनंदन । चैतन्य घनस्वरूप ॥३७॥ असतां भ्रांति पडदा साचार । तेथींचा हा निजनिर्धार। शोधूनियां न पाहती नर । तोचि विचार अवधारा॥३८॥ दोहीं भागांचा व्यापार । जेंवी चालवी नटेश्वर । तेंवी सीता श्रीरामचंद्र । धरिती अवतार देवकार्या॥३९॥ स्वपदी स्थापावया सुरवर ।भक्तां द्यावया सुख साचार । सीता आणि श्रीरामचंद्र । धरिती अवतार स्वलीला ॥४०॥ अवताराच्या स्वलीळा । साकारें शोभे जनकबाळा। तिच्या स्वरूपाचा सोहळा । ऐकें कुशळा हनुमंता ॥४१॥ सीतेसी नित्य न गमनागमन । हे मुख्य ओळखावी खूण। सीतेचें अचरण चळण । चरणेंवीण गति तीसी ॥४२॥ द्वंद्वेंवीण पदद्वंद । तेचि सीतेचें निजपद । जीवशिवपणाचा उच्छेद । तो पदबंध सीतेचा॥४३॥ फडा पुच्छा वांकुडा नाग । तो नाग म्हणती सोनेंचि सांग । तेंवी गुल्फा जानू विभाग । सीतेची चांग चिन्मात्र ॥४४॥ सीतागुह्येंद्रियविचार । तिचे निजगुह्य श्रीरामचंद्र । तेथील रतिसुखाचें सार । असारसार श्रीराम ॥४५॥ श्रीसीतेंचें जें कां निजउदर । मळेंवीण निर्मळ साचार । चैतन्याग्नि वसवी जठर । तें माहेर जीवशिवां ॥४६॥ सीतेंचे जें हृदयभुवन । नित्य वसवी श्रीरघुनंदन । हे मुख्य हनुमंता ओळखण । सुखसंपन्न श्रीरामें ॥४७॥ आंगींच्या अंगीं वाढोनी दोनी । जीवशिव कुच दोन्ही स्थानीं । जग जीववी स्तनपानीं । कुचकामिनी स्तनभारें ॥४८॥ जीवशिवकुचाच्छादनीं । विद्या अविद्या पांखे दोनी । बांधिले त्रिगुणांचे कसूनी[२]। श्रीरामावांचोनी कोण सोडी ॥४९॥ जीवशिवकुचांचे मर्दन। करिता एक श्रीरघुनंदन । येर बापुडें मशक कोण । मरेल रावण अभिलाषी ॥५०॥ श्रीरामनामाचें निजमणी । गांठ्याळ फिकेचे सांडोनी। अनुस्यूत[३] तंतु घेवोनी। अनुसंधानीं ओंविले ॥५१॥ सौभाग्य-कल्याणश्रेणी। जे अतर्क्य जननयनीं । कंठी श्रीराम आहेवमणी[४]। जो शिरोमणी अलंकार ॥५२॥ कंठावरील चिबुका[५]। रामश्यामें गोंदली देखा। रावण पाहता तिचिया मुखा। श्यामशंका तो मानी ॥५३॥ जनमुखींचे अधर अधर। सीतामुखींचे ते अधर सधर । आवडीं चुंबी श्रीराम चंद्र । तें सुखसार सीतेसी ॥५४॥ मुक्तपणाच्या विलासा। वनिताअधरीं सुवर्णफांसा । पडोनि मुक्त आलें नासा । रामपरेशा न भजोनी ॥५५॥जानकीनाकींचे निजमोतीं। सहज देखे श्रीरघुपती । अधोमुखें ओळकंबती । मुक्तामुक्ती श्रीरामें ॥५६॥ जगमुखींचें नासिक । श्लेष्मागमनें[६] पावे दुःख। जानकीमुखीं नाका बिक[७]। चढलें देख श्रीरामें॥५७॥ जानकीचे निजनयन। देखणेपणें सुनयन । तेणें देखणेपण जाण। श्रीराम परिपूर्ण तें देखे॥५८॥ जानकीचे देखणे नेत्र। सांडोनियां क्षराक्षर। भूतमात्रीं देखे अक्षर । चिदचिन्मात्र श्रीराम ॥५९॥ सीतेचे जे निजश्रवण । सावधान नित्य जाण। वचनाक्षरें रघुनंदन । समाधान श्रवणार्थी ॥६०॥ धन्य सीतेंचे कपाळ । श्रीरामनमनें नित्य सफळ । प्रेमकुंकुम सोज्वळ । सुखकल्लोळ श्रीरामें॥६१॥ सीताहस्तक्रिया समस्त। कर्ता देखे

शब्दार्थ : १. साखरेचे, २. घट्ट, ३. अखंड, ४. मंगळसूत्रमणी, ५. हनुवटी, ६. शेंबूड येऊन, ७. तेज.

श्रीरघुनाथ। श्रीराम हातांचाही हात। कर्मनिर्मुक्त श्रीरामें ॥६२॥ सीतासतीचे निजशिरीं। राम शिरोमणी शिरावरी। चिद्रत्नांच्या अलंकारीं। फरा[1] त्यावरी शोभत ॥६३॥ गाळोनियां परम पीयूष। सोलींव सुखाचेंही निजसुख। तेणें ओतींव श्रीमुख। अलौकिक रामप्रिया ॥६४॥ जानकींचे मन सुमन। श्रीरामध्यानीं तें परिपूर्ण। मनीं मननचि निर्मन। सावधान श्रीरामें ॥६५॥ सीतेच्या चित्तीं रामचिंतन। तेणें चित्त चिंताविहीन। चित्तीं चित्त चैतन्यघन। समाधान श्रीरामें ॥६६॥ जानकीदेहींचा देहाभिमान। अहंसोहंकोहंविहीन। करितां श्रीरामनामस्मरण। अहं पूर्णपरब्रह्म ॥६७॥ समुद्रीं विरोनि लवण। स्वयें समुद्र होय आपण। तेंवी सीतेचा अभिमान। होय परिपूर्ण श्रीरामें ॥६८॥ सीतादेहींची निजबुद्धी। नाहीं प्रपंच परत्र आधी[2]। नाहीं जन्ममरणव्याधी। नित्यसमाधि श्रीरामें ॥६९॥ जानकीच्या निजदेहीं। देहा देहत्वचि नाहीं। देहीं वर्ततां विदेही। हे खूण पाहीं नित्यत्वें ॥७०॥ ऐसें सीतेचें लक्षण। ऐक आतां तिचे गुण। गुणागुणीं नित्य अगुण। स्वयें सगुण दिसताहे ॥७१॥ जानकींचे पाहतां ठाण। सर्वांसी दिसे साधारण। परी तीस ठेंगणें गगन। स्वरूपें सामान्य दिसतांहि ॥७२॥ सीतेंचे निजमहिमान। वेदशास्त्रां अगम्य जाण। सांगों जातां ठाणमाण[2]। पडे मौन चहूं वाचां ॥७३॥ सीतारूपरेखागुणलक्षण[3]। सांगितलें ठाणमाण। आतां स्थितीचें महिमान। सावधान अवधारीं ॥७४॥

**सीतेची अवस्था :** सीतेची जेथ वसती घडे। तेथें राम राम स्मरती झाडें। पशुपक्षियां स्मरण घडे। पाषाण खडे राम स्मरती ॥७५॥ जानकी स्पर्शाचें जीवन। नित्य स्मरे श्रीरघुनंदन। जानकी जीवननिमग्न। त्यास समाधान श्रीरामें ॥७६॥ सीतासतीची निजधरा। नित्य स्मरे श्रीरामचंद्रा। सीतांगस्पर्शाचा वारा। श्रीराघवेंद्रस्मरणेंसीं ॥७७॥

**हे सर्व ऐकत असता मारुतीचा ब्रह्मानंद :** सीतास्वरूपवृत्तांत। आदरें सांगे श्रीरघुनाथ। तें ऐकतां हनुमंत। पडे मूर्च्छित स्वानंदें ॥७८॥ सप्रेम प्रेमयुक्त। मूर्च्छित पडिला हनुमंत। कृपें कवळी श्रीरघुनाथ। हृदयाआंत आलिंगी ॥७९॥ देतां हनुमंता आलिंगन। श्रीराम नाठवे रामपण। मारुतीस नाठवे वानरपण। ब्रह्म परिपूर्ण स्वयें जाला ॥८०॥ विरोनि गेलें मीतूंपण। खुंटले बोल तुटलें मौन। दोघे जाले चैतन्यघन। वस्तु परिपूर्ण परिपूर्णत्वें ॥८१॥ सीतेंचें स्वरूप सांगतां। धणी[4] न पुरे श्रीरघुनाथा। धन्य धन्य श्रीरामकांता। तेणें हनुमंता उल्लास ॥८२॥ तुम्ही सीताशुद्धि करितां। या खुणा पहाव्या हनुमंता। असें श्रीरामें सांगतां। मारुतीचित्ता आल्हाद ॥८३॥ हनुमंत म्हणे श्रीरघुनाथा। इहीं लक्षणीं लक्षितां। मी जाणेन जनकदुहिता। सीता सर्वथा मज नेणे ॥८४॥ पूर्वी मज नाहीं देखिलें। पूर्वी मज नाहीं ऐकिलें। अकस्मात रामें धाडिलें। सत्यत्वें बोल मानीना ॥८५॥

**मारुतीला खुणा समजल्याचे रामांना आश्वासन :** ऐसाचि रावण कपटी। संन्यासवेषे घेऊनि भेटी। मज सिंतरिलें[5] भिक्षेसाठीं। त्याचि परिपाटीं वानरू ॥८६॥ श्रीरामाच्या गोड गोष्टी। शुद्धि सांगतो गोमटी। परी हा वानर कपटी। विश्वास पोटीं मानीना ॥८७॥ जेथें विश्वास नाहीं पोटीं। तेथें जालिया व्यर्थ भेटी। भावार्थाच्या गुह्य गोष्टी। सीता गोरटी सांगेना ॥८८॥ नाहीं भेटी नाहीं गोष्टी। दुरोनि सीता देखिली दृष्टीं। ऐसिये शुद्धीचे परिपाटीं। तृणासाटीं सरेना ॥८९॥ सीतामनोगत सकळ। सीता वसती तें कोण स्थळ। रावणाचें किती बळ। तें मी सकळ शोधीन ॥९०॥ ऐसें मनोगत श्रीरघुनाथा। जेणें मज आप्त मानील सीता। ऐसिया देखावें कार्यार्था। चरणीं माथा ठेविला ॥९१॥

---

शब्दार्थ : १. अलंकार विशेष, २. मानसिक व्यथा, ३. शरीराचा बांधा, ४. तृप्ति, ५. फसविले.

रामांनी हनुमंताजवळ आपली मुद्रिका (अंगठी) दिली : ऐसें बोलतां हनुमंता। परम सुख श्रीरघुनाथा । निजात्ममुद्रा होय देता । ठेवोनि माथां वरदहस्त ॥९२॥

ददौ तस्मै ततः प्रीतः स्वनामांकोपशोभितम् । अंगुलीयमभिज्ञानं राजपुत्र्या परंतपः ॥२॥
एतद्दृष्ट्वा हरिश्रेष्ठो दर्शने जनकात्मजा । मंस्यते मन्नियुक्तं त्वां लाघवं न करिष्यति ॥३॥

मुद्रिका देखिलिया दृष्टीं । सीता सुज न मानी कपटी । म्यां धाडिलासी शुद्धीसाठीं। सत्य गोरटी मानील ॥९३॥ श्रीरामनामांकित मुद्रा । देखतांचि सीता सुंदरा । आप्त मानील कपींद्रा। श्रीरामचंद्राचेनि धर्मे ॥९४॥ मुद्रा देखोनि नामांकित । जीवाहूनियां परम आप्त । सीता मानील हनुमंत। रामकार्यार्थ साधील ॥९५॥ आधींच वानर बळवंत । त्यावरी मस्तकीं श्रीरामहस्त। श्रीराममुद्रा जाली प्राप्त । उल्लासत हनुमंत ॥९६॥

ती मुद्रिका कोठे पडू नये म्हणून आपल्या मुखात ठेविली : घेईन त्रिभुवनीं घरधांडोळीं[१]। शोधोनियां जनकबाळी । करीन राक्षसां रवंदळीं[२]। हर्षे टाळी पिटिली ॥९७॥ श्रीराममुद्रा आली हाता। लंका जाळीन मी आतां । किती बळ लंकानाथा। तेंही सर्वथा तुकीन ॥९८॥ इंद्रजित बळी निशाचरी । त्यासीं मी करीन संग्राम थोरी । रावणा करीन थोर मारी । करीन बोहरी[३] राक्षसां ॥९९॥ येणें हर्षे हनुमंत । नमस्कारूनि श्रीरघुनाथ । वेगीं उडाला गगनांत । रामाकार्यार्थ साधावया ॥१००॥ श्रीराममुद्रा घालितां हातीं । उडतां गळोनि पडेल क्षितीं । वस्त्र[४] नाहीं मारुतीप्रती । पालवाप्रती बांधावया ॥१॥ गांठीत घालितां गांठ्याळ । विकल्प मानी तो सट्याळ । आळ करी तो खट्याळ । जाण चांडाळ नाठवी तो ॥२॥ नाम नावडे जयासी । तो जाणावा पापराशी । सकळ दोष तयापासीं । क्षयो त्यासी आकल्प ॥३॥ रामनाम न माने जयासी । अर्थवाद म्हणे नामासी । जितांचि प्रेतत्व त्यासी । स्पर्शो नये तयाला ॥४॥ धन्य युक्ति त्या कपींद्रा । हाता येतां श्रीराममुद्रा । मुखीं घालोनि वानरेंद्रा । केला थारा निजहृदयीं ॥५॥ वानरांचे ठेवणें । गालफडां भरावे चणे । हनुमंतेंहि तैसेंचि करणें । मुखी घालणें श्रीराममुद्रा ॥६॥ जिव्हेपासून हृदयभुवन । नाममुद्रे सांठवण । हनुमंतें करोनि उड्डाण । शीघ्र गमन रामकार्या ॥७॥

हनुमंत पुनश्च अगंदाकडे आला : नळ नीळ जाबंवंत । जेथें अंगद वाट पाहत । तेथें आला हनुमंत । सीताशुद्ध्यर्थं[५] शोधावया ॥८॥ आला देखोनि हनुमंत । अंगद जाला हर्षयुक्त । वानरां आल्हाद बहुत । दक्षिणपंथ शोधावया ॥९॥ एकाजनार्दना शरण। शोधावया दिशा दक्षिण । वानरवीरां उल्लास पूर्ण। तेंही निरूपण अवधारा॥११०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां श्रीरामहनुमत्संवादो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥ ॥ओंव्या॥११०॥ श्लोक ॥३॥ एवं संख्या॥ ११३॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

## अध्याय चौदावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### वानरांचा गुहाप्रवेश

एक महिना होतांच पूर्व, पश्चिम व उत्तरेकडील वानर परत आले : पूर्व पश्चिम वायव्य ईशान्य। उत्तर नैर्ऋत्य आग्नेयकोण । पाताळदिशा स्वर्गभुवन । आले शोधून वानर ॥१॥

तदहः प्रथमं कृत्वा मासे प्रस्रवणं गताः । कपिराजेन संगम्य निराशाः कपिकुंजराः ॥१॥
समेत्य मासे संपूर्णे सुग्रीवमुपचक्रमुः । तं प्रस्रवणपृष्ठस्थमभिगम्याभिवाद्य च ।

शब्दार्थ : १. घरांचा शोध, झडती, २. नाश, ३. तोलून पाहीन, ४. पृथ्वीवर, ५. सीतेचा शोध लावण्याकरिता.

सुग्रीवं प्लवगाः सर्वे सुषेणप्रमुखा ब्रुवन् ॥२॥

राया सुग्रीवांचे आज्ञापन । मासें एकें संपूर्ण । अवघीं यावें सीता शोधून। न येतां दारुण राजदंड ॥२॥

सर्वजण शोध न लागता परत आले : प्रस्रवण गिरिवर[१] । तेथें वसे श्रीरामचंद्र । तयापासीं सुग्रीव वीर । नित्य तत्पर सेवेंसीं ॥३॥ श्रीराम पुसे सुग्रीवासी । वानर गेले दशदिशीं। कोणी नाहीं आला शुद्धीसीं। विलंब त्यासीं कां जाला॥४॥ ऐसे करीत जंव विचार। सुग्रीवराजाज्ञा अति दुर्धर[२]। तेणें भयें वानरवीर । आले समग्र एक मासांतीं ॥५॥ शुद्धि न लभेचि साचार । अति सलज्ज वानरवीर । न येती श्रीरामासमोर । करिती नमस्कार सुग्रीवा ॥६॥ प्रतिज्ञा करोनि केलें नमन । शेखीं[३] आलों शुद्धीविण। लाजा[४] न बोलवे वचन। अधोवदन[५] तटस्थ ॥७॥ तटस्थ देखोनि वानरवीर । वालिसुग्रीवांचा श्वशुर । पुढें होवोनि सुषेण वीर । सांगे विचार शुद्धीचा ॥८॥

विचित्ताः पर्वताः सर्वे वनानि गहनानि च । गुहाश्च विचिताः सर्वा यास्त्वया परिकीर्तिताः ॥३॥
निम्नगाः सागरांताश्च सर्वे जनपदास्तथा । सत्वान्यतिप्रमाणानि विचितानि हतानि च ॥४॥
गहनेषु च देशेषु दुर्गेषु विषमेषु च । ये चैव गहना देशा विचितास्ते पुनः पुनः ॥५॥
विचिताश्च महागुल्मलतावितततसंतताः । राक्षसा मानवाश्चैव तत्र तत्र प्लवंगमाः ॥६॥
ये चैव गहना देशा विचितास्ते पुनः पुनः । प्रवृत्तिं चैव वैदेह्या नानुविंदामहे प्रभो ॥७॥

सुषेणाच्या वृत्तांत : क्षीरसमुद्र क्षारसमुद्र । दधिमधुघृतसमुद्र । सहावा तो इक्षुसमुद्र। सुरासमुद्र सातवा ॥९॥ शाल्मलिद्वीप शाकद्वीप । क्रौंचद्वीप कुशद्वीप । पुष्करद्वीप प्लक्षद्वीप । जंबुद्वीप सातवें ॥१०॥ अयोध्या मथुरा माया जे कां । काशीं कांची अवंतिका । बळीचेनि द्वारें आलों देखा । ते द्वारका सातवी ॥११॥ दंडकारण्य खंडारण्य । चंपकारण्य वेदारण्य । नैमिषारण्य ब्रह्मारण्य । धर्मारण्य सातवें ॥१२॥ सरें[६] सरिता[७] गुहा[८] गव्हरें[९]। खेटें खर्वटें[१०] ग्राम नगरें । जन विजन गिरिकंदरें । विवरें विवरें शोधिली ॥१३॥ निंद्य अनिंद्य स्थानें । दुर्धर राक्षसांची भुवनें । तेथें तेथें प्रवेशोन । केलें शोधन सीतेचें ॥१४॥ आळस सांडोनि वानर। आतुर्बळी महावीर । भूगोळ शोधितां समग्र । सीता सुंदर न लभेचि ॥१५॥ सप्तद्वीप सप्तसागर । सप्तपुरी सप्तशिखर । सप्तरण्ये सप्तकंधर । सीता सुंदर शोधिली ॥१६॥ जळ स्थळा आणि निराळ[११]। शोधून पाहतां जनकबाळ। शुद्धि न लभे अळुमाळ[१२] । आलों सकळ एकमासा ॥१७॥ राजाज्ञा अति दुर्धर । समयीं न येतां विटंबु थोर । तेणें भयें आम्ही समग्र । आलों सत्वर एक मासा ॥१८॥ सलज्जलज्जा वीरपंक्ती । श्रीरामासंमुख न येती । काय मुख दाखवूं तयाप्रती । सीता सती नुगमेचि ॥१९॥ श्रीराम आम्हांस पुसेल सीता। आम्ही काय सांगावी वार्ता । आम्हां वानरां समस्तां । बैसली माथां महालाज ॥२०॥ वानरवीरांचें मनोगत । श्रीराम जाणोनि समस्त । त्यांसी स्वयें आश्वासित । युक्तायुक्तविभागें ॥२१॥ तुम्हांसी दिशा नेमिल्या आम्हीं । सीता नाहीं त्या भूमीं। कैंची शोधून आणावी तुम्हीं । अति आक्रमीं शोधोनि ॥२२॥ सीता नाहीं पैं तेथ । हें वचन सत्य सत्य । सत्यासी मानिजेल अनृत[१३]। रासभमत तयापासीं ॥२३॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । वानरीं मस्तकीं धरिले चरण । श्रीरामें दिधलें आलिंगन । समाधान वानरां ॥२४॥ साधावया श्रीरामकाज। वानरीं सोडोनियां लाज । करावया रावणासीं झुंज । नाचती भोजें[१४] स्वानंदें ॥२५॥ समयो लोटला साचार । न येती दक्षिणेचे वीर । ते शुद्धि आणितील साचार । श्रीरामचंद्र अनुवादें[१५] ॥२६॥

---

शब्दार्थ : १. प्रसिद्ध पर्वत, २. कडक, ३. शेवटी, ४. लज्जेने, ५. खाली तोंड घालून, ६. सरोवरे, ७. नद्या, ८. गुहा, ९. खेडी, १०. लहान खेडी, ११. आकाश, १२. किंचितही, १३. खोटे, १४. सुखाने, १५. बोलला.

सह तारांगदाभ्यां स; प्रस्थितो हनुमान्कपिः । स तु दूरमुपागम्य सर्वैस्तैर्हरिभिः सह ॥८॥

दक्षिणेकडील सैन्याचा वृत्तांत : श्रीराममुद्रा झालिया प्राप्त। वेगें निघाला हनुमंत। नळनीळादि जांबुवंत । वाट पाहत तिष्ठती॥२७॥ येरीकडे दक्षिणेसीं । वानर वीर पराक्रमेंसीं। सीताशुद्धि करिती कैसी । श्रोतीं सावकाशीं अवधारिजे[१] ॥२८॥ हनुमंत येवोनियां तेथ। दक्षिणदिशेच्या शोधनार्थ । अंगद अति उल्लासयुक्त। कपींसमवेत निघाला ॥२९॥ गुहा गहन गव्हरें । शैल कक्षा[२] कुहरें[३] । विवरें उखरें[४] शिखरें। गिरिकंदरें शोधित।॥३०॥ खाती नानाविध फळें। सेविती नदीनिर्म जळें । नीतीनें शोधिती स्थळें । निजबळें वानर ॥३१॥ वानरवीर अति उद्भट[५]। अटवी[६] शोधिती विकट । पुढें ओढवलें अति दुर्घट । अति संकट तें ऐका ॥३२॥

यत्र वै निष्फला वृक्षा विपुष्पाः पर्णवर्जिताः । निस्तोयाः सरितो यत्र मूलं यत्र सुदुर्लभम् ॥९॥
दंडो नाम महाभागः सत्यवादी तपोधनः । तस्य तस्मिन्वने पुत्रो बालको दशवार्षिकः ॥१०॥
प्रनष्टो जीवितान्ताय लब्धस्तत्र महामुनिः । तेनैव मुनिना शप्तं कृत्स्नं तच्च महद्वनम् ॥११॥

निर्जन, निर्जल व रुक्षप्रदेशात प्रवेश : पुढें वन अति विकळ । वृक्ष कांखरले[७] सकळ। नाहीं पत्र पुष्प फळमूळ । शुष्क जळ सरितांचें ॥३३॥ वनीं नाहीं मुंगी माशी । नाहीं पशुपक्षी कीटकेंसी । सूर्य तपे निजदाघेंसीं[८] । तेणें कासाविसीं वानरां ॥३४॥ नाहीं फळमूळ भक्षावयासी। पाला न मिळे वानरांसी । जळ न मिळे प्राशनासी । कासाविसी वानरां ॥३५॥ त्यजावया दुष्ट तें स्थान । वानर करितां उड्डाण । उडी पडे तेथिंचे वन। निर्गमन[९] दिसेना ॥३६॥ निर्गम न पुरे बाहेरी । क्षुधे तळमळिजे वानरीं । जळेंविण येती लहरी । उष्णेंकरी तळमळिती ॥३७॥ ऐसें वानरां परम कष्ट । ओढवलें दुःख दुर्घट । बाहेर जावया न फुटे वाट । प्राणसंकट मांडलें ॥३८॥ आतां कायसी सीताशुद्धि । आम्हांसी आली प्राणांतविधी[१०]। येथें निर्गत न दिसे बुद्धी । आम्ही त्रिशुद्धी[११] निमालों॥३९॥ ये वनीं रिघतां यावें मरण । ऐसा ऋषिशापदारुण । वानरां नित्य रामस्मरण । तेणें सप्राण वांचलें ॥४०॥

त्या वनाचा मूळ वृत्तांत हनुमंत सांगतात. दंडक ऋषीचा दहा वर्षांचा मुलगा वनदेवतांनी मारिला : श्रीराम भक्तांचा सहकारी। नामें दैन्य दुःख निवारी। शापोपदग्धवनांतरीं[१२]। नामोच्चारीं वांचलें ॥४१॥ त्या वनाचा समूळ वृत्तांत । वानरां सांगे हनुमंत । दंडऋषींचे वन शापयुक्त । निर्गम येथ असेना॥४२॥ ऐसा शाप अति दारुण । द्यावयासी काय कारण । त्या शापांचे समूळ लक्षण । सांगे आपण हनुमंत ॥४३॥ दंडऋषीचा निजसुत। दशवर्षी[१३] प्रज्ञावंत। वनदैवतीं करोनि घात । मांस समस्त भक्षिलें ॥४४॥

पित्याच्या शापाचा प्रभाव : त्याचें अस्थिचर्म जाण। पशुपक्षीं केलें भक्षण । ऋषीनें जाणोनियां ज्ञान। शाप दारुण दिधला ॥४५॥ दुर्धर शापें जाणा येथ। हें वन जालेंसें उपहत[१४] । जो प्राणी येवा वनांत । त्यासी प्राणांत ऋषिशापें ॥४६॥

मुलगा विद्वान्; परंतु ब्राह्मणांचा उपमर्द करणारा : विद्यासंपन्न ऋषिसुत । वेदशास्त्रार्थी अति उन्मत्त । वादीं ब्राह्मणां निर्भर्त्सित । यालागीं घात भूतीं केला ॥४७॥

त्यामुळे तो ब्रह्मराक्षस झाला व वन निर्जन झाले : जो वादी ब्राह्मणां देत त्रास । तो जातीचा ब्रह्मराक्षस । त्याचा देह तो भूतग्रास[१५]। यालागीं नाश भूतीं केला ॥४८॥ ऐकतां हनुमंताची मात । वानरां झाला अति आकांत । सर्वेचि दुसरा अनर्थ । त्या वनांत ओढवला ॥४९॥ त्या ऋषीचा निजसुत । ब्रह्मराक्षत्व त्यासी प्राप्त । तो राहोनियां त्या वनांत । स्वयें भक्षित प्राणिमात्रां ॥५०॥

शब्दार्थ : १. ऐकावे, २. संचारस्थाने, ३. बिळे, ४. माळजमिनी, ५. पराक्रमी, ६. अरण्य, ७. वाळून गेले, ८. आपल्या उष्णतेने, ९. सुटका, १०. मरणकाळ, ११. खरोखर, १२. शापाने जळलेल्या रानात, १३. दहा वर्षांचा, १४. ओसाड, १५. भूतांचे भक्ष्य.

ददृशुस्तं महाकायमसुरं भीमकर्मणा । सहितान्वानरान्सर्वांस्तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् ॥१२॥
तमापतंतं सहसा वालिपुत्रोंऽगदास्तदा । रावणोऽयमिति ज्ञात्वा तलेनाभिजघान ह ॥१३॥
स वालिपुत्राभिहतो मुखाच्छोणितमुद्धमन् । असुरो न्यपतद्भूमौ पर्यस्त इव पर्वतः ॥१४॥

शापामुळे झालेला तो राक्षस भयंकर गर्जना करून वानरांना भक्षण करण्यासाठी आला : विकळ देखोनियां वानर। स्वयें भक्षावया समग्र। वेगीं धांविन्नला निशाचर[1]। गिरागजर गर्जोनी ॥५१॥ अग्निकुंड जेंवी सोज्ज्वळें । तैसे आरक्त दोनी डोळे । वानर गिळावया सगळे । धांवे अवाळे[2] चाटित ॥५२॥ येतां देखोनि राक्षसासी । वानर चालिले युद्धासी । अंगदें उडोनि आवेशीं । तळहातेंसी ठोकिला ॥५३॥

अंगदाच्या एकाच तडाख्याने त्याचा नाश केला, व त्याला मुक्ती मिळाली : अंगद म्हणे पैं आपण । हा राक्षस होय रावण । बळें हाणोनि चडकण[3]। घायें प्राण घेतला ॥५४॥ गाय हाणितां निष्ठुर । नाकीं तोंडी वमूनि रुधिर[4]। अचेतन[5] पर्वताकार । निशाचर पडिला ॥५५॥ श्रीरामभक्तांच्या हातीं । ब्रह्मराक्षसा जाली मुक्ती । ऋषि सुखोवोनि चित्तीं । शापनिर्मुक्ति वना केली ॥५६॥ वानरांचें वन प्रवेशन । तैं शापनिर्मुक्ति पावे वन । जेथें जेथें जाती भक्तजन। तें तें स्थान अति मुक्त ॥५७॥

सर्व वानर भुकेने व्याकुळ होतात : रणीं पाडिला निशाचर । अंगद विजयी राजकुमर। वनीं न मिळे आहार नीर[6]। तेणें वानर तळमळिती ॥५८॥ सुग्रीवें सांगितलें ज्या रीतीं । निबरें उखरें[7] विपिनें क्षितीं। सीता[8] शोधावी शतावर्तीं[9]। नाना पर्वतीं आयासें ॥५९॥ सीताशुद्धीची निजकथा । लाग माग न लभे वार्ता । काय करावें आम्हीं आतां। चिंता समस्तां वानरां ॥६०॥

गजो गवाक्षः शरभो गवयो गंधमादनः । मैंदश्च द्विविदश्चैव हनुमान्जांबवान्नलः ॥१५॥
अंगदो युवराजश्च नीलश्च वनगोचरः । क्षुत्पिपासापरीतास्तु श्रांताश्च सलिलार्थिनः ॥१६॥

गज गवाक्ष गवययुक्त । शरभ गंधमादन विख्यात । मैंद द्विविद जांबवंत । वीर हनुमंत नळ नीळ ॥६१॥ अंगद युवराज आपण। क्षुधेनें जावों पाहे प्राण । तृषा फुटलें अंतःकरण । आलें मरण वानरां ॥६२॥ वानरवीर अति विख्यात । पाला न मिळे आहारार्थ । क्षुधा[10] तृषा[11] परमोदित । मग प्रार्थित हनुमंत ॥६३॥

हनुमंताची प्रार्थना : अवघे म्हणती हनुमंता । आम्ही शरण आलों आतां । शरणागतां आम्हां समस्तां । प्राणदाता तूं होई ॥६४॥ आमचे वांचवावया प्राण । तुझे अंगीं सामर्थ्य पूर्ण । तुज देवांचें वरदान । जीवदान दे आम्हां ॥६५॥ वानरवीर ऐशिया रीतीं । पीडिले येती काकुळती । त्यांसी वांचवावयाचे अर्थीं । वनीं मारुती निरीक्षी ॥६६॥

ततः पर्वतसंकाशो हनुमान्वानरर्षभः । अवलोक्य वन सर्वं संपश्यत्स्थिरचक्षुषा ॥१७॥
निरीक्षमाणो ददृशे वृक्षाः स्निग्धाः समंततः ।अब्रवीद्वानरान्सर्वान्कांतारवनकोविदाः ॥१८॥
नूनं सलिलवानत्र भविष्यति महान्हदः । बिलादस्मात्सुनिष्कांता हंसाः सारसवञ्जुलाः ॥१९॥
जलार्द्राश्चक्रवाकाश्च निष्कांताश्च सहस्रशः ॥२०॥

सर्व वनाची पहाणी करतात. गुप्त जलाचा सुगावा : वन निरीक्षी हनुमंत । विवर देखे तंव त्या वनांत । वृक्षाजाळीमाजी गुप्त। जळपक्षी तेथ रिघतां देखे ॥६७॥ क्षुधे तृषे अत्यंत क्षीण ।

शब्दार्थ : १. राक्षस, २. जिभल्या, ओष्ठप्रांत, ३. थप्पड, ४. रक्त, ५. निर्जीव, ६. उदक, ७. शुष्क, ८. पृथ्वीवर, ९. शतावर्त = स्थानविशेष, १०. भुकेने, ११. तहानेने.

त्या वानरां सांगे आपण । येथें आहे जलस्थान । सावधान तुम्ही पहा ।।६८।। चंचू[1] धरोनियां फळें । आंतून निघती पक्षिकुळें । हंस सारस बक वंजुळें[2] । निघती समेळें चक्रवाकें ।।६९।। मत्स्य धरोनि मुखासीं । ढोंक[3] निघती विवरप्रदेशीं । फळ जळ आहे विवरीं निश्चयेंसी । तृप्ति तुम्हांसी मी देईन ।।७०।। आम्ही श्रीरामाचे भक्त । भक्तां संरक्षी श्रीरघुनाथ । क्षुधा केवी करील घात । राम समर्थ तुष्टला ।।७१।। ऐकोनि हनुमंताची मात । वानरां आठवला श्रीरघुनाथ । श्रम गेला निमेषार्धांत । विवरार्थ पाहूं आले ।।७२।। चंचू धरोनियां फळें । असंख्य निघताती पक्षिकुळें । देखोनि वानरांचे पाळे[4] । सुकसमेळें हरिखले ।।७३।। वानर बोलती विस्मित । धन्य धन्य देखणा हनुमंत । गुप्त विवर जाळीआंत । जळयुक्त लक्षिलें ।।७४।। ऐसें विनविलें हनुमंता । अवघीं चरणीं ठेविला माथा । आम्हांसी जीवदाता । प्राणरक्षिता तूं आम्हां ।।७५।। तूं तंव सर्वांतीं अदट[5] । तुझा सत्संग आम्हां श्रेष्ठ । आम्हां बाधेना संकट । तूं वरिष्ठ रक्षिता ।।७६।।

**मारुतीच्या सांगण्यावरून सर्व वानरांचा बिळात प्रवेश :** हनुमंत म्हणे वानरांजवळी । अवघे प्रवेशा ये बिळीं । तृप्ति पावोनि फळीं जळीं । जनकबाळीं स्वयें शोधूं ।।७७।।

प्रविश्यात्र विचेष्यामो रावणं राक्षसाधमम् । तां च सीतां महाभागाः सर्व एव महद्बले ।।२१।।
इत्युक्त्वा तद्बिले सर्वे प्रविष्टास्तिमिरावृतम् । अचंद्रसूर्यं हरयो ददृशू रोमहर्षणम् ।।२२।।
ततस्तस्मिन्बिले दुर्गे नानापादपसंवृते । अन्योन्यं संपरिष्वज्य जग्मुर्योजनमंतरम् ।।२३।।
ते नष्टसंज्ञाः संभ्रांतास्तृषिताः सलिलार्थिनः । परिपेतुर्बिले तस्मिन्मासमेकं बुभुक्षिताः ।।२४।।

तें देखोनियां विवर । गजबजिले वानरवीर । भीतरीं घडघुंग[6] अंधार । रवि चंद्र भासेना ।।७८।। प्रवेशतां विवराआंत । वानरां थोर भयसंकेत । पुढें चालिला हनुमंत । विवरप्रांत शोधावया ।।७९।। येरयेरांचा[7] धरोनि हात । वानर हनुमंता कवळित । प्रवेशले विवराआंत । भयभीत अवधारीं ।।८०।। विवरमार्ग अति कठिण । आपणा न देखती आपण । ऐसे आंधारीं दारुण । उभ्यां प्राण निघों पाहे ।।८१।। वानरवीरां एक मास । निखळ[8] पडले उपवास । अन्नोदकेंवीण कासावीस । विवरीं त्रास पावले ।।८२।। शक्ति नाहीं पुढें जावयासी । मागें परतोनि यावयासी । मार्ग लक्षेना तयांसी । वानरांसी अति दुःख ।।८३।।

**महिन्याचा उपवास व चालण्याचे श्रम यामुळे वानरांना मूर्च्छा :** विवरमार्ग अति दारुण । तमामाजी[9] एक योजन । अति संकटीं केलें गमन । मूर्च्छापन्न मग झाले ।।८४।। तमें गिळिली प्रज्ञासंज्ञा[10] । निराहारें गिळिलें चैतन्या । तृषेनें शोषिलें वदना । शब्दसंज्ञा निमाली ।।८५।। जेंवी प्रळयकाळीं जीव । महातंमी[11] होती आप्लव[11] । तेंवी वानरवीर सर्व । पूर्वापूर्व विसरले ।।८६।। वानर पडिले चेतन । हनुमंत बळिया संपूर्ण । एकैक पुच्छीं बांधोन । करी गमन तेणेंसीं ।।८७।। देखोनि वानरांची अवस्था । मागें सरणें नाहीं हनुमंता । विवर शोधावयाचे अर्था । घेवोनि समस्तां निघाला ।।८८।। हनुमंताचे देखणे नेत्र । आवरूं न शके अंधार । पुच्छीं वानरांचा भार । घेवोनि सत्वर चालिला ।।८९।।

**मारुतीने सर्व वानरांना पुच्छात बांधून प्राण रक्षणाकरिता पित्याचा धावा केला :** वांचवावयो वानरांचा प्राण । हनुमंतें केलें विंदान[12] । पिता पाचारोनि पवन । सांगे आपण तें ऐका ।।९०।। श्रीरामकार्यालागीं जाण । वानरां परमानंदें मरण । तुवां रक्षावा यांचा प्राण । सेवा संपूर्ण श्रीरामीं ।।९१।। श्रीरामसेवाहितवचन । तेणें संतोषोनि पिता पवन । वानरांचा निजप्राण । स्वयें आपण संरक्षी ।।९२।। श्रीरामाचे निजभक्त । जरी अदृष्टे जाले मूर्च्छित । तरी काळाचा न चले घात । श्रीरघुनाथ रक्षिता ।।९३।।

---

शब्दार्थ : १. चोंचीमध्ये, २. पक्षिविशेष, ३. बगळे, ४. समुदाय, ५. पराक्रमी, ६. निबिड, ७. परस्परांचा, ८ सारखे, ९. अंधारात, १०. बुद्धी आणि शुद्धी, ११. बुडून जातात, १२. युक्ती, कौतुक.

श्रीरामभक्तांचे संरक्षण, हनुमंताला प्रकाश दिसतो : भक्त सावधान असावधान। त्यासी न विसंबे श्रीरघुनंदन। बाधूं न शके जन्ममरण। काळें वदन काळाचें।।९४।। नामें गर्जती अखंड । त्यांचेनि पवित्र ब्रह्मांड । भक्तां करूं जातां दंड । काळें तोंड काळाचें ।।९५।। भक्त श्रीरामीं लळेवाड[1] । श्रीराम त्याचें पुरवी कोड[2] । नामें गर्जोनि वितंड । ठेंचिलें तोंड काळाचें ।।९६।। हनुमंत देखोनि श्रीरामदूत । कळिकाळ चळीं कांपत । हरिभक्ता करावया घात। नव्हे समर्थ कळिकाळ।।९७।। हनुमंतें तेच आवेशीं। वानर तारिले बांधोनि पुच्छीं। सद्गुरुशिष्य निजकाजेंसीं । अनाथांसी तारक ।।९८।। वानरां मूर्च्छा जरी प्राणांत । जवळी सद्गुरु हनुमंत । येणें सुसंगें चुकला घात। अति समर्थ तारक ।।९९।। श्रीरामभक्तांची निजकथा। ग्रंथ नाकळें आकळितां । एका शरण साधुसंतां। विवरवार्ता अवधारा।।१००।। पुच्छीं बांधोनि वानरकोटी। हनुमंत चालिला जगजेठी[3]। पुढें प्रकाश देखिला दृष्टीं। सुखसंतुष्टी सर्वांसी ।।१।। आतां ही हनुमंताची गोष्टी। नाम आठविल्या संकटीं । विघ्नें पळती बारा वाटीं। नामें जगजेठी तारक ।।२।।

प्रकाशामुळे वानर सावध व हनुमंत स्तुतीः होतां प्रकाशाचें भान। अमृतमय प्रभा पूर्ण । वानर झाले सावधान । देखोनि स्थान विस्मित।।३।। आम्ही मूर्च्छित पडिलों क्षितीं । अद्‌भुत हनुमंताची शक्ती । सकळ श्रमा करोनि शांती। स्वस्थगतीं आणिलें ।।४।। आम्हांसी मूर्च्छित सांडून । एकला नयेचि आपण । कोट्यनुकोटी वीर उचलोन। आला घेवोन कृपाळु ।।५।। नळनीळादि जांबवंत। स्वयें अंगद गुण वर्णित। अवघीं वंदोनि हनुमंत। स्वस्थचित्त राहिले ।।६।। एकाजनार्दना शरण । निधडी[4] हनुमंता आंगवण। अचेतन वानरसैन्य । आला घेवोन विवरांत ।।७।। त्या विवरामाजी उद्बोध[5] । तापसीहनुमंत संवाद । तो एकाजनार्दनीं विनोन। परमानंद रामायणीं।।८।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे वानरबिलप्रवेशो नाम चतुर्दशोऽध्यायः ।।१४।। ओंव्या ।।१०८।। श्लोक ।।२४।। एवं ।।१३२।।

## अध्याय पंधरावा

।। श्रीरामचंद्राय नमः ।।

### तापसी-हनुमंत-संवाद

सावध झाल्यावर त्या वानरांना सभोवती सुवर्णभुवन दिसते : वानर होवोनि सावधान। पाहती तंव हेमभुवन । हेमशय्या हेमासन। उपरी आस्तरण हेमाचें ।।१।। हेममय तेथींची क्षिती । हेममय अवघ्या भिंती । हेमदीपिका हेमदीप्ती । पात्रपंक्ती हेममय ।।२।। हेमविमानें हेमांबरें । हेमबद्ध सरोवरें। हेममत्स्य हेमनगरें। जळचरें हेममय।।३।। मुक्ताफळें हेमरत्नें । हेमपदकें हेमभूषणें । हेममय उपकरणें । हेमाभरणें पशुपक्षी ।।४।।

ते विवर सर्व समृद्धीने निर्मल जलप्रवाहांनी परिपूर्ण : विवरीं धनधान्यसमृद्धी। विवरीं परमामृतनदी । विवरामाजि ऋद्धिसिद्धी । सुख त्रिशुद्धी वानरां।।५।। नसोनि रविचंद्रभास[6]। विवरामाजी नित्य प्रकाश । तेणें वानरां अति उल्लास। पाहती वास[7] वायुपुत्राची।।६।। ऐसिये रमणीय स्थानीं। हनुमंत पाहोनियां नयनीं। मनुष्यमात्र न दिसे नयनीं । सकळ भुवनीं शोधितां ।।७।।

त्या निर्जन प्रदेशात एका कुमारी तापसीचे दर्शनः अपूर्व देखिलें मंदिरामाझारीं। चीरकृष्णाजिनधारी । तापसी बैसली एक कुमारी । तेजेंकरीं[8] देदीप्यमान ।।८।। तपःप्रताप आगळा । अंगीं तेजाचा उमाळा। तिसी देखतांचि डोळां । वानरपाळा[9] शंकला ।।९।।

शब्दार्थ : १. लाडके, २. इच्छा, लाड, ३. पराक्रमी, ४. मोठी, ५. ज्ञान, ६. सूर्यचंद्रांचा प्रकाश, ७. वाट, ८. तेजाने, ९. वानरांचा समूह.

हनुमंताचा तिला प्रश्न : तिचा शोधावया मुख्यार्थ। पुसता झाला हनुमंत। तूं कोण या भुवनाआंत। बिलवृत्तांत मज सांगें ॥१०॥

आत्मनस्त्वनुभावाद्वा कस्य चेदं महद्बिलम्। अजानतां नः सर्वेषां सर्वमाख्यातुमर्हसि ॥१॥

तूं एकाकी स्त्री अबळा। तप:प्रभावें तेज:प्रबळा। कोणें निर्मिलें या बिळा। तुज या स्थळा केंवी प्राप्ति ॥११॥ विवरीं समृद्धि संपूर्ण। सुखरूप शोभे भुवन। येथील राजा सांग कोण। तेणें हें कां स्थान त्यजियेलें ॥१२॥ आश्रमासी आलों येथ। आम्ही तुझे अभ्यागत। पुसिला सांगोनि वृत्तांत। करीं स्वागत अतिथींचे ॥१३॥

एवमुक्ता हनुमंता तापसी धर्मचारिणी। प्रत्युवाच हनूमंतं सर्वभूतहिते रतम् ॥२॥
मयो नाम महातेजा मायावी दानवर्षभः। पुरा दानवमुख्यानां विश्वकर्मा बभूव सः ॥३॥
तेनेदं कांचनं सर्वं निर्मितं मायया वनम्। कथं चेदं बिलं दुर्गं युष्माभिरुपलक्षितम् ॥४॥

त्या गुप्त विवरात आल्यांबद्दल तिला आश्चर्य : ऐसें पुसतां हनुमंत। तापसी जाली अति विस्मित। हें विवर अति गुप्त। वानर येथ केंवी आले ॥१४॥ यक्षराक्षसां दुर्गम नित्य। देवदानवां विवर गुप्त। तुम्ही काय श्रीरामभक्त। तरीच येथें आलेती ॥१५॥

श्रीरामनामाचा प्रभाव : श्रीरामनामाचा विश्वास ज्यांसी। नामीं आवडी अहर्निशीं। दुर्गमीं रिघ त्या भक्तांसी। निश्चयेंसी मी जाणें ॥१६॥ नाम आवडे मानसीं। स्मरण न करीच अति आळसी। वांझ गाय कपिला[1] जैसी। जाण तैसी ते भक्ति ॥१७॥ श्रीरामनाम आवडे पोटीं। नामेंवीण टवाळ गोष्टी। तेही आवडी समूळ खोटी। नये शेवटीं उपयोगा ॥१८॥ मुलाम्याचीं नाणीं जैसीं। घातकी होतीं ज्याचीं त्यासी। दांभिक भक्ति जाण तैसी। साधकांसी अपघाती ॥१९॥ निजात्मप्रतीति कैंची त्यासी। भजन नुरे ज्याचें त्यासी। विकल्प होळ पडिलें भक्तीसीं। लोभें त्यासी नागविलें ॥२०॥ तुम्ही नेटाचे[2] श्रीरामभक्त। विवरीं प्रवेशतां येथ। देहलोभें नित्यनिर्मुक्त। तुम्ही समस्त मज पूज्य ॥२१॥ जन्ममरणाची भयशारी[3]। तुम्हीं घालोनि तोडरी। प्रवेशलेती या विवरीं। राम निर्धारीं भक्तांचा ॥२२॥ रामस्मरण अहर्निशीं। विघ्नें निर्विघ्न होती त्यासी। तो प्रताप तुम्हां वानरांसी। तुमची दासी मी आतां ॥२३॥ तुम्हां वानरां समस्तां। मुख्य भक्त तूं श्रीहनुमंता। श्रीरामभजनीं एकाग्रता। तुम्हां समस्तां तारक ॥२४॥

तप:सामर्थ्याने तिला हनुमंताविषयी ज्ञान व आदर : म्यां जें केलें अनुष्ठान। तेणें मज जालें ज्ञान। हनुमंताचे भक्तिसमान। नाहीं आन तिहीं लोकीं ॥२५॥ ऐसें बोलतां तापसी। प्रेम लोटलें तियेसी। लोटांगणीं हनुमंतासी। उकसाबुकसी स्फुंदत ॥२६॥ अग्निकापुरा होतां भेटी। विरोनि येरयेरांचे पोटीं। निरालंब[4] उरे शेवटीं। तैसीच गोष्टी तेथें जाली ॥२७॥ निर्धारितां हनुमंतरूप। तापसी झाली अरूप। पाहतां तापसीचें रूप। सुखस्वरूप हनुमंत ॥२८॥ भक्तभेटीचें लक्षण। लक्षलक्षातीत गहन। मनीं मनें चैतन्य। समाधान येरयेरां ॥२९॥ म्यां तप केलें निष्काममतीं। त्या तपाची जाली फलप्राप्ती। भाग्यें भेटलासी मारुती। भवनिर्मुक्ति तारक ॥३०॥ श्रीरामभक्त ज्यांस भेटती। दर्शन स्पर्शन संवाद[5] स्थिती। भावें भवभावनिर्मुक्ती[6]। हेही प्रतीती[7] मज आली ॥३१॥ ऐसें बोलोनि तत्वतां। हनुमंतचरणीं ठेविला माथा। जें तुवां पुसिलें हनुमंता। समूळ कथा सांगेन ॥३२॥

तापसीची साद्यंत कथा, हैमदानवनिर्मितीचे स्थळ: मयदानव तेजोराशी। मायाविंदान तयापासीं। दानवीं देखोनि लाघवासी। केलें त्यासी विश्वकर्मा ॥३३॥ दानवांची पुरें

शब्दार्थ : १. काळ्या रंगाची, २. नि:सीम, ३. भयाची धडकी, ४. ब्रह्म, ५. संभाषण, ६. संसारापासून सुटका, ७. अनुभव.

मंदिरें । कवचें यंत्रें शस्त्रास्त्रें । हेमविमानें छत्रचामरें । अति विचित्रें निर्मिलीं ।।३४।। मुक्ताफळें हिरे रत्नें । हेमभूषणें हेमोपकरणें । मायालाघवविंदानें । जें करणें तें मायिक ।।३५।। मायालाघवी चपळ । निजवस्तीलागी प्रबळ । तेणें निर्मिलें हेमबिळ । अतर्क्य स्थळ अति गुप्त ।।३६।। येथें नसतां रविचंद्रांसी । नित्य प्रकाश विवरासी । हें लाघव तयापासी । अतर्क्य कोणासी तर्केना ।।३७।। हेमतरुवर स्वादफळीं । हेमसरोवर अमृतजळीं । हेमजळचर क्रीडती तळीं । हेमकमळीं सुगंध ।।३८।। हेममंदिरें हेमभिंती । हेमभूमिका हेमक्षिती । मय मायिक मायावी स्थिती । जाण निश्चितीं कपिराजा ।।३९।।

स तु वर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महावने । पितामहाद्वरं लेभे सर्वमौशनसं धनम् ।।५।।
विधाय सर्वबलवान्सर्वकामेश्वरस्तदा । उवास सुखितः कालं किंचिदस्मिन्महाबिले ।।६।।

**मयासुराचे तप, ब्रह्मदेवाजवळ मरणरहित अवस्थेची याचना :** तेणें मयासुरें येथ। बैसोनियां महावनांत । ब्रह्मा प्रसन्न केला तपोयुक्त । तपनेमार्थ साधोनि ।।४०।। मय वरद मागे आपण। म्यां शत्रु मारावे संपूर्ण । मज न यावें मरण । ऐसें वरदान मज द्यावें ।।४१।। ऐकोनि मयाचें वचन । ब्रह्मा झाला हास्यवदन । जन्मासवें नित्य मरण । वरदान केंवी लाभे ।।४२।। निर्मरणवरू मागतां । हिरण्यकशिपु निजयोग्यता । सजीव निर्जीव नको म्हणतां । नखाग्रता निमाला ।।४३।। मयासुरा तेचि कथा । मरण नको वर मागतां । यासी आली मरणावस्था । निर्मरणता केंवी लाभे ।।४४।। देहाभिमानाचिये माथां । नित्य वसे मरणावस्था । अहंममता न सांडितां। निर्मरणता केंवी लाभे ।।४५।। ऐक माझें वरदान । विवरीं असतां नये मरण । बाहेर निघतांचि जाण । वैरी प्राण घेतील ।।४६।। वैरी आलिया विवरांत । तुझेनि हातें पावती घात । बाहेर निघतां निःशंकत। तेथींचा तेथ निमसील।।४७।। मयासुरा ऐक निश्चिच। जो जाला विषयासक्त । त्यावरी करी काळ घात । सत्य वाक्यार्थ ब्रह्मवाणी ।।४८।।

**विवरात मृत्यू येणार नाही असे त्याला वरदान :** ब्रह्मा वदे वरदार्थ। सर्वेचि पडिला विचारांत। सुरवर लोभें निघतां येथ। विवरीं समस्त निमतील ।।४९।। यालागीं सुरवरां अतर्कित । बिळद्वार केलें गुप्त । मयासुर होता नांदत । तोही मरणार्थ पावला ।।५०।।

**विवर गुप्त ठेवून तेथूनच असुरांच्या हस्ते देवांवर जारणमारणाचे आभिचारिक प्रयोग :** तापसीस पुसे हनुमंत। मरण नये विवरांत । ऐसा ब्रह्मयाचा वरदार्थ । मयासुर मृत्यु का पावला ।।५१।। मयासुर बैसोनि विवराप्रती । जारण मारण इंद्रवधार्थी । दैत्यदानवांस सांगे युक्ती । मंत्रयंत्रोक्ति मोहका ।।५२।। यालागीं मयासुरवधार्थ । इंद्र साक्षेपें टपत । रिघों न पावे विवरांत। द्वारीं तिष्ठत सर्वदा ।।५३।। बाहेर येणें नाहीं मयासी । इंद्र मारूं न शके त्यासीं। तो स्वयें पुसे ब्रह्मयासी। मय मरावयासी निजयुक्ति ।।५४।। ब्रह्मा सांगे इंद्रापती । मयासी कामिनीकाम-प्रीती । बाहेर आणोनि प्रमदायुक्तीं[1] । त्यासी तूं घातीं अमरेंद्रा ।।५५।।

तमप्सरसि हेमायां सक्तं दानवपुंगवम् । शनैर्निष्क्रांतमालोक्य निजधान पुरंदरः ।।७।।

**ब्रह्मदेवाच्या सूचनेवरून त्याच्या प्रलोभनासाठी हेमा अप्सरेची नेमणूक :** हेमा अप्सरी सुंदरी । माझी सखी निजनिर्धारीं। ब्रह्मयानें घातली विवरीं। मयासुरा मरणार्थ ।।५६।। कामिनीकामाचा आल्हाद । शुंभनिशुंभ सुंदोपसुंद। पुरुष निमाले विविध। मरण प्रसिद्ध स्त्रीकामें[2] ।।५७।। कामिनीकामाची आसक्ती । मागें निमाले नेणों किती । पुढें स्त्रीकामेंही मरती । अधोगती स्त्रीकामें ।।५८।। हेमाप्सरी सुंदरी । येतां देखोनी विवरीं । मयासुर पडिला फेरीं ! भाग्यें करीं आलीसी ।।५९।। हेमाकामिनीं काम गहन । दोघीं केलें मद्यपान । करीत गायन नर्तन । बाहेरी आगमन दोघांचे ।।६०।।

---

शब्दार्थ : १. अत्यंत सावध राहून, २. स्त्रीच्या इच्छेने.

तिच्याबरोबर बाहेर आल्यावर इंद्राचा त्याच्यावर वज्राघात : कामिनिकामें नृत्यगीतस्वरीं । तीसवें आला विवराबाहेरी । इंद्रें साधूनियां वैरी । वज्रेंकरी[1] मारिला ॥६१॥

ब्रह्मदेवाने सुवर्णमय भुवन तिला दिले : मय मायिक हेममंडन । ब्रह्मा होवोनि प्रसन्न । हेममय करोनि भुवन । दिधलें स्थान हेमेसी ॥६२॥

इदं च ब्रह्मणा दत्तं हेमायै वनमुत्तमम् । शाश्वतः कामभोगश्च गृहं चेदं हिरण्मयम् ॥८॥
दुहिता मेरुसावर्णेरहं तस्याः स्वयंप्रभा । मम प्रियसखी हेमा नृत्यगीतविशारदा ॥९॥
तया दत्तवरं चेदं रक्षामि भवनं महत् ॥१०॥

ब्रह्मा होवोनि सुप्रसन्न । हेमेसी हेममय भुवन। स्वयें दिधलें संतोषोन । आणि स्थान अति दुर्गम[2] ॥६३॥

सुवर्णमनूची स्वयंप्रभा नावाची कन्या : सुवर्णमनूची मी दुहिता[3]। स्वयंप्रभा नामांकिता। हेमा सखी माझी आप्तता । एकात्मता दोहींसी ॥६४॥ तेचि काळीं म्यां आपण । ब्रह्मयासी मागितलें वरदान । द्यावें निष्काम अनुष्ठान । मुक्तत्व पूर्ण मज द्यावें ॥६५॥

ब्रह्मदेवाच्या कृपेनें निष्काम अनुष्ठानाचे तिला वरदान : ऐकोनि माझी विनंती । संतोषला प्रजापती । आवडीं मानोनी वचनोक्ती । अति प्रीतीं स्वयें वदला ॥६६॥ धन्य निष्कामाचें वदन। धन्य निष्कामाचें वचन। धन्य निष्कामआगमन। जग पावन निष्कामें ॥६७॥ निष्कामाचे मज कौतुक । निष्कामाचें मज सुख । देखोनि निष्कामांचें मुख । परम हरिख[4] हरिहरां ॥६८॥ ये विवरीं हरिहर स्थान । पावसी निष्काम अनुष्ठान । स्वयंप्रभे सत्य जाण । हें वरदान तुज माझें ॥६९॥

श्रीरामभक्तांशिवाय दुसरे येथे कोणीही येणार नाही अशी वरप्राप्ती : आणिका रीघ नव्हे येथ । विवरा येती श्रीरामभक्त। त्यांचें केलिया आतिथ्य। नित्यमुक्त त्यांचेनि ॥७०॥ हरिदासदर्शनस्पर्शन। अभिवंदन[5] संभाषण। आतिथ्य करितां संपूर्ण। मुक्तपण निजवंद्य ॥७१॥ हरिदासांची संगती। भाग्येंवीण नव्हे प्राप्ती । हरिदासांची सद्भक्ती। नित्यमुक्ती स्वभावें ॥७२॥ ऐसें मज देवोनि वरदान। अदृश्य जाला चतुरानन। हेमा माझी सखी जाण। तिचें हें भुवन ब्रह्मदत्त ॥७३॥

हेमा सकाम तपस्येने स्वर्गास गेली : हेमा सकाम कामासक्ती । येथें नाहीं पुरुषप्राप्ती । मज ठेवोनि रक्षणार्थी । स्वर्गाप्रती ते गेली ॥७४॥ ब्रह्मवाणी सत्यभूत । ते हे तुम्ही श्रीरामभक्त । माझेनि भाग्यें आलेती येथ । मज निर्मुक्त करावया ॥७५॥ ऐसें बोलोनियां जाण । तापसी घाली लोटांगण। वंदोनि हनुमंताचे चरण । काय आपण विनवित ॥७६॥ क्षुधें पीडिले वानर । वनीं रिघोनि समग्र । फळें भक्षावीं मधुर । प्राशावें नीर स्वादिष्ठ ॥७७॥

अर्थी चास्मि प्रयच्छार्थं रणधर्ममनुत्तमम् । प्रीयमाणा निराहारान्संजीवय तपोधने ॥११॥

भुकेल्या वानरांसाठी आहाराची याचना : ऐकोनि तापसीचें वचन । हनुमंत बोले आपण । भुकें वानरांचे जाती प्राण । वृक्षारोहण न करवे ॥७८॥ वानर असते सावधान । मघांचि विध्वंसिते वन । तुज पुसावया राहतें कोण । क्षुधेनें क्षीणबळशक्ति ॥७९॥ वानरांची शक्ती क्षीण । वृक्षीं न करवे उड्डाण । आणोनि द्यावें आपण । वांचवीं प्राण क्षुधितांचे ॥८०॥

अभिगम्योत्तमं दानं दानमाहूय मध्यमम् । याच्यमानं तु अधमं सेवादानं ततोऽधमम् ॥१२॥

दानाचे प्रकार, स्वयंदान अत्युतम : आणून देणें जें आपण । हें दानामाजी उत्तम दान । जें द्यावें घरा पाचारून। मध्यम दान त्या नांव ॥८१॥ वेळोवेळां काकुळती । येवोनि याचक मागती । ऐसें देणें तयांप्रती । दानस्थिति ते निंद्य ॥८२॥ वसवसून देती अन्न । एक देती

शब्दार्थ : १. वज्राने, २. अति अवघड, ३. कन्या, ४. हर्ष, आनंद, ५. नमस्कार करणे.

निर्भर्त्सून । तें तें अधमाधम दान । पात्रा निंदोन जे दे ।।८३।। सेवा घेवोनि आपण। द्विजांसी देती जें दान । दान नव्हे ते मजुरी जाण। दातृत्व पूर्ण अधमाधम ।।८४।। यालागीं स्वधर्मरक्षण। करावया स्वयंप्रभे जाण। आततांसी फळें अर्पून । वांचवीं प्राण वानरांचे ।।८५।।

साधोस्तस्य वचः श्रुत्वा तापसी ब्रह्मचारिणी । आदाय फलमूलानि विधिनोपाहरत्तदा ।।१३।।
भक्षयित्वा च ते सर्व पीत्वा च विमलं जलम् । प्रसन्नवदनाः सर्वे सर्वे संतुष्टमानसाः ।।१४।।
सर्वेऽपि बलवीर्याढ्यास्तत्रासन्हरियूथपाः । अपश्यन्सर्व एवैते दिशो वानरपुंगवाः ।।१५।।

तापसीने स्वतः फळे आणून वानरांना दिली : ऐकोनि हनुमंताचे वचन । तापसी फळें आणूनि पूर्ण । करोनि विधियुक्त पूजन । दिधलें भोजन तें ऐका ।।८६।। पृथु चक्रवर्ती आपण । जैसें करी भगवत्पूजन । तेंवी हनुमंतादि वानरगण । पूजी संपूर्ण उल्लासें ।।८७।। जया जैसें आवडे फळ । जया जैसें आवडे मूळ । तया तैसें अर्पूनि जळ । सुपरिमळ शिखरणी ।।८८।। वानरां हेमाचीं ताटें । फळें ओगरिलीं[1] चोखटें । नाना रसीं भरिले वाटे। अपूर्ण कोठें पडो नेदी ।।८९।। आम्ररसें मधुरसें। अमृतरसें सुरस रसें । वानरां पीडिलें मासोपवासें । अति उल्लासें भक्षिती ।।९०।।

फळाचें अंतर्दृष्टीने वर्णन : एके विडुळलीं[2] सकाम वातें। एके हिरवीं करकरितें। एकें बहुबीजें[3] बुचबुचितें। एकें कचकचित अर्धकाचीं।।९१।। एकें जडजाड्यें जारठलीं[4]। एकें सकाम लोभें सारटलीं[5] । विकल्पमुरडें मुरकुटलीं । झडोन पडलीं अमार्गीच ।।९२।। एकें अभाववातें[6] झडली। वनिताकुचकर्दमीं पडलीं । सवेंचि तेथोनि गडबडलीं । ती बुडालीं अंधतमीं ।।९३।। एकें विवादकर्मठें[7] । विधिनिषेधअतिअंबटें। एके तपस्तेजें तिखटें । एकें तुरटें मतमुद्रा[8] ।।९४।। एकें वरिवरी बरवंटें। आंत द्विजद्वेषाचें कांटे । एकें दिसताती चोखटें। अति कडवटें परनिंदा ।।९५।। एके भेदवादें खणुवालीं। सभेदाच्या बुचबुचित आळीं । त्यांसी न सेविती काउळी । पडिल्या धुळीतें मिळती ।।९६।। गारठेलीं[9] फळें अशांत । पडोनि फुटलीं जेथींची तेथ। वानर त्यांसी न लाविती हात । दुर्गंधि ते अति दुष्ट ।।९७।। एक समेळ फळांचे घड गाढे। आदळले पाखाडियापुढें । फुटोनि होती पैं तुकडें। पडती किडे सुळसुळती।।९८।। एकें संज्ञानतेचिया शिखरीं। पडोनि जालीं काचरीं । त्यांसी न सेविजे वानरीं। झडपिती घारी गर्वाच्या ।।९९।। वनिता हातींहूनि निसटलीं । अहमंमतादेठींहूनि सुटलीं। संकल्पविकल्पें तुटलीं । फळें आलीं परिपाका।।१००।। नित्य निर्विकारें पाडा आलीं। शांतिसेजे स्वयें मुरालीं। जी नैराश्यें मघमघिलीं। फळें सेविलीं वानरीं ।।१।। शांत दांत अरुवारलीं[10]। आंत बीज न बाहेरी साली। सुखस्वरूपें साकारिलीं । फळें सेविलीं वानरीं ।।२।। निजात्मबोधे मघमघित । नित्य नैराश्यें रस गळत । जेथें हंस शुक झेंपावत । तीं फळें भक्षित वानर ।।३।। अहंकोहं सोहंविहीन। ब्रह्मी ब्रह्मत्वही लीन। सांडोनियां मीतूंपण । फळें परिपूर्ण सेविती ।।४।। बहुकाळाचे बुभुक्षित। केले परिपूर्ण नित्य तृप्त । बाप कृपाळु श्रीरघुनाथ। संकटीं भक्त वांचविले ।।५।। संकट बाधू जाती भक्त। संकटीं निकट श्रीरघुनाथ। द्वंद तेथें निर्द्वंद्व होत । भक्त निर्मुक्त श्रीरामें ।।६।। ऐसिया पूर्णत्वाचे सिद्धीं। वानरां जाली पारणाविधी[11]। श्रीराम कृपाळु द्वंद्वबाधी। भक्त त्रिशुद्धीक वांचविले ।।७।। ग्रंथीं बोलतों त्रिशुद्धी । त्रिशुद्धीची कवण विधी । सद्गुरुवीण नव्हे सिद्धीं । सावध बुद्धी अवधारा ।।८।। शब्द निःशब्द शब्दशुद्धी । आशा निराशा मनःबुद्धी। देहीं विदेहत्व

शब्दार्थ : १. वाढली, २. पचपचित झाली, ३. पुष्कळ बियांची, अपक्क, ४. निबर झाली, जून झालीं, ५. अर्धवट कठिण झालेली, ६. आकुंचित झालीं, ७. चांगली, ८. छिद्रयुक्त, ९. वाळलेली, १०. रसाळ, ११. उपोषणानंतरचे भोजन

देहशुद्धी । जाणा त्रिशुद्धी पावन ॥९॥ ऐशिया त्रिशुद्धीं वानर। पावोनि तृप्त अभयंकर। देती स्वानंदे उद्गार[1] । तेणें अंबर गर्जत ॥११॥

वानरांची तृप्ती : फळें खाती गटागटां । मिटक्या देती मटमटां । लाळ येतसे नीळकंठा । भक्तवाटा सेवावया ॥११॥ वांकुल्या दाविती सुरवरां । वांकुल्या दाविती ऋषीश्वरां । फळें सेवितां वानरां । दुःखा दुस्तरा मूकले ॥१२॥ वानर भोजनसमाजें। मिटक्या देतां अंबर गाजे। तापसी धाडिली श्रीरघुराजें। कपिसमाजा वांचवावया।।१३।। संरक्षावया निजभक्तांसी । श्रीरामें निर्मिली विवरासी[2]। श्रीरामें धाडिली तापसी । वानरांसी वांचवावया ॥१४॥

बुभुक्षितांना अन्नदान, सर्व दानाहून श्रेष्ठ : बुभुक्षितांसी तृप्तिभोजन। तेणें सुखी श्रीभगवान । तापसीचें भाग्य गहन । श्रीरामजन सुखी केलें॥१५॥ दुष्काळींचें द्विजभोजन। राजसूर्यागाहूनि गहन[3]। अश्वमेधादिक यज्ञ । मशक[4] होय त्यापुढें ॥१६॥ बुभुक्षितां दिधलें अन्न । सुखी केले दीनजन। तेणें सुखावे श्रीभगवान । यज्ञादि पुण्य ते मशक।॥१७॥ तापसीचें भाग्य गहन । फळें आणोनि संपूर्ण । वानरां देतांचि भोजन । सावधान ते जाले ॥१८॥ विधिनोपाहरत्तदा । याचि धरोनि श्लोकाच्या पदा । वानरजनसंपदा । ग्रंथानुवादा मी वदलों ॥१९॥ व्यर्थ वाढविले ग्रंथा । ऐसें न म्हणावें श्रोतां । मुनीच्या धरोनि पदार्था । ग्रंथीं ग्रंथता राम वदवी ॥१२०॥ नेणें वेदशास्त्रश्रवण । माजे अंगीं मूर्खपण। माझें हिरोनि मीपण । राम रामायण स्वयें वदवी ॥२१॥ श्रोते म्हणती नवलावो । वानरभोजनअभिप्रावो । शुद्ध साधूनी भक्तिसद्भावो । ब्रह्मान्वयो स्थापिला ॥२२॥ आधींच रम्य रामायण । वरीं हें रसाळ निरूपण । कथा नव्हे ब्रह्म पूर्ण । सुखी पूर्ण आम्हां केलें ॥२३॥ ऐकोनि श्रोतियांचे वचन । एकाजनार्दनी लोटांगण । जें देखाल माझें न्यून । तें तें संपूर्ण तुम्हीं कीजे ॥२४॥ श्रोते म्हणती नवल आतां । स्वयें श्रीराम वदनीं वक्ता। रामें रम्य रामकथा। न्यूनपूर्णता असेना॥२५॥ एकाजनार्दना प्रबोधी । वानरा जालीं पारणाविधी । पुढें लाभेल सीताशुद्धी । शोधनविधी अवधारा॥२६॥ स्वति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां तापसीहनुमंतसंवादो नाम पंचदशोऽध्यायः॥१५॥ ओंव्या ॥१२६॥ श्लोक॥१५॥ एवं ॥१४१॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥

## अध्याय सोळावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### संपातीचा उद्धार

फळांनी व पाण्याने वानरांची तृप्ती : वानरां मास उपोषण । तापसीं फळें आणूनि पूर्ण । दिधलें यावृत्तृप्ति[5] भोजन । वानरगण उल्लासी ॥१॥

संतृप्तास्ते फलैर्मूलैः संजाताः शीतवारिणा । बलवीर्याश्च ते सर्वे तत्रासन्हरिपुंगवाः ॥१॥

अपतन्सर्व एवैते दिशो वानरयूथपाः ॥२॥

भक्षितां पैं फळमूळ। सेविता निर्मळ जळ। वानर सुखी जाले सकळ। हर्ष प्रबळ तृप्तीचा ॥२॥ वानरांचे सकळ दळ। पूर्विल्यापरिस अति प्रबळ । शतगुणें वाढलें बळ। जनकबाळ शोधावया ॥३॥

यानंतर सर्व वानरांची परत जाण्याची इच्छा : वानर म्हणती हनुमंतासी। येथें काय फळें

शब्दार्थ : १. ढेकर, २. विवरात, ३. मोठे, ४. क्षुल्लक, ५. तृप्तता होईपर्यंत.

खावया आलासी । किंवा सीता शोधावयासी । त्या रामकार्यासी साधावें ॥४॥ शोधितां या विवराआंत । सीता न लभेचि निश्चित । पुढील सांग कर्तव्यार्थ । दक्षिणपंथ शोधावया ॥५॥ रविशशिविरहित । नित्य प्रकाश विवरांत । वानर दशदिशा पाहात। दक्षिणपंथ दिसेना ॥६॥ पूर्व कोण पश्चिम कोण । न कळे उत्तर दक्षिण। न कळे दशदिशांचे ज्ञान। केउतें[1] गमन करावें ॥७॥

अथ तानब्रवीत्सर्वान्विश्रांतान्हरिपुंगवान् । किं कार्यं कस्य वा हेतोः कान्ताराणि प्रपद्य च ॥३॥
इदं वचनमेकाग्रा तापसी धर्मचारिणी । यदि चैतन्मया श्राव्यं श्रोतुमिच्छामि तां कथम् ॥४॥

तापसीच्या प्रश्नावरून कार्याविषयी निवेदन : अत्यंत भार ज्याचे माथां। कां जो त्वरेनें धावतां। अतिशयेंसीं उन्मत्तता। कथा वार्ता नये पुसों ॥८॥ जो कां ज्ञानगर्वें पीडित। जो विषयमदें उद्धत। जो जो अतिशय क्षुधित। त्यासी वृत्तांत पुसों नये ॥९॥ तापसी म्हणे वानरनाथा। वार्ता पुसों नये क्षुधिता । फळभोजन सावधानता। सांगे वृत्तांता मनींच्या ॥१०॥ विवर गूढ अति कांतार[2]। मिळोनि आले वानरभार । येथें कां आलेती सकळ वीर । तोही विचार मज सांगा ॥११॥ तुम्ही श्रीरामाचे भक्त। माझेनि भाग्यें आलेती येथ । विवरीं प्रवेशावया गुप्त । कोण कार्यार्थ मज सांगा ॥१२॥ मी तंव तुमची केवळ दासी। कार्या सांगों ये मजपासीं । ऐसें मानिलिया तुम्हांसी । तरी कार्यासी मज सांगा ॥१३॥

तस्यास्तद्वचनं श्रुत्वां हनूमान्मारुतात्मजः । आर्जवेन यथातत्वमाख्यातुमुपचक्रमे ॥५॥

ऐक तापसी पूर्ववृत्तांत । पूर्ण ब्रह्म श्रीरघुनाथ । अवतरला सूर्यवंशाआंत । कौसल्यासुत दाशरथी ॥१४॥ पित्राज्ञेच्या निजनेटीं । बंधु सौमित्र सीता गोरटी । श्रीराम वनवासी पंचवटीं। गंगातटीं रहिवास ॥१५॥ रामलक्ष्मण गेले मृगापाठीं । मागें शून्य पंचवटी। भिक्षुरूपें[3] रावण कपटी। सीता गोरटी चोरिली ॥१६॥ तिचें करावया शोधन । किष्किंधे आला रघुनंदन। वाळी भ्रातृभार्याहरण । विंधोनि बाण मारिला ॥१७॥ राज्य दिधलें सुग्रीवासीं । यौवराज्य अंगदासी। सुग्रीवें धाडिलें आम्हांसी। सीताशुद्धीसी दक्षिणे ॥१८॥ दक्षिण शोधिली शतावर्ती । शुद्धि न लभेचि सीता सती। सीताशोधनशुद्ध्यर्थी। विवराप्रती आम्हीं आलों ॥१९॥ सुग्रीवाज्ञा अति दारुण । मासा यावें शुद्धि करून । न ये तया रासभारोहण[4]। विटंबन अपमानें ॥२०॥ विवरीं करितां प्रवेशन । मास एक लोटला संपूर्ण । विवर दुर्गम गहन । निर्गमन[5] दिसेना ॥२१॥ बिळीं करितां प्रवेशन । आम्ही जालों मूर्च्छापन्न । कैसेंनि येथें आगमन । हेंही ज्ञान आम्हां नाहीं ॥२२॥ विवरींचें अभिनव चिन्ह। न कळे उत्तर दक्षिण । न कळे पूर्वपश्चिमभान । केउतें गमन करावें ॥२३॥ आमची आगती[6] निर्गती[7]। आम्हांसी न कळे निश्चितीं । तुजअधीन आमची गती । कृपामूर्ति कृपा करीं ॥२४॥

विवराबाहेर जाण्याची उत्कंठा : आमची विवराबाहेर गती । आम्हांसी भेटे सीता सती । ऐसी कृपा करीं शीघ्रगतीं। वानरपंक्ती उद्धरीं ॥२५॥ ऐसें ऐकतां वचन। तापसी जाली सुप्रसन्न। विवरींचें गमनागमन। नेणती सज्ञान द्विजदेव ॥२६॥ ब्रह्मयाची वरदोक्ती । विवरीं आलियांची नव्हे निर्गती। बाहेर या विवराप्रती। यावया युक्ती लक्षेना ॥२७॥ मज ब्रह्मा सुप्रसन्न। विवरींचें गमनागमन । करावया मी सज्ञान[8] । हें वरदान ब्रह्मयाचें ॥२८॥ ज्यासी श्रीरामाची भक्ती । दुर्गमीं त्यासी निर्गती । रामनामप्रतापशक्ती । भवनिर्मुक्ति हरिभक्तलां ॥२९॥ श्रीरामनांचेनि कैवाडें[9] । कळिकाळ पळती पुढें । विवर कायसें बापुडें । तुम्हां सांकडें[10] बाधावया ॥३०॥ श्रीरामसेवा नित्यकर्म। हृदयीं श्रीरामाचें प्रेम । नित्य मुखीं श्रीरामनाम। सर्वत्र सुगम[11] गति त्यांसी ॥३१॥ पैल हनुमंतादि वीर। भक्तिप्रतापें प्रताप थोर। श्रीरामनामाचे गुणगंभीर। येणें

शब्दार्थ : १. कोणीकडे, २. अरण्य, ३. संन्याश्याचे रूप घेऊन, ४. गाढवावरून धिंड, ५. बाहेर जाण्याला मार्ग, ६. येणे, ७. जाणे, ८. जाणती, ९.साहाय्याने, १०. संकट, ११. सोपी.

उद्धार वानरांसी ॥३२॥ आजि माझें सफळ अनुष्ठान । होतां हनुमंतदर्शन । मी जालें सुखसंपन्न । महिमा गहन सत्संगें ॥३३॥ जप तप ध्यानस्थिती । अवघी सार्थक सत्संगती । त्या सत्संगाची अगाध कीर्ती । भवनिर्मुक्ति[1] सत्संगें ॥३४॥

त्या तापसीच्या सांगण्यावरून सर्व वानरांनी डोळे झाकले : श्रीरामभक्तांच्या पंक्ती । आलेती माझिया भाग्यगती[2] । सेवा करीन यशाशक्ती । बिलनिर्मुक्ती[3] वानरां ॥३५॥

सर्वानिव बिलादस्मात्तारयिष्यामि वानरान् । निमीलयत चक्षूंषि सर्वे वानरपुंगवाः ॥६॥

बिळाबाहेर निर्गती । व्हावया वानरां समस्तीं । डोळें झांकावे निजहस्ती । माझ्या वचनोक्तीं विश्वासा ॥३६॥ डोळे उघडें असतां । देव दानव ऋषिमहंतां । विवराबाहेर निर्गमता । कदा कल्पांता घडेना ॥३७॥ ऐकोनि तापसीचें वचन । वानरीं आपलाले आपण । निजकरीं झांकोनि नयन । सावधान निर्गमार्थी ॥३८॥ वानरीं झांकोनियां डोळे । मुहूर्त एक उभे ठेले । उघडा ऐसे कोणी न बोले । मग पाहूं लागले उघडोनि ॥३९॥

निमेषोत्तरमात्रेण बिलादुत्तारितास्तया । ततस्ते ददृशुर्घोरं समुद्रं वरुणालयम् ॥७॥
अपारमभिगर्जंतं घोरैरूर्मिभिराकुलम् । मयस्य मायाविहितं गिरिदुर्गं विचिन्वताम् ॥८॥
तेषां मासो व्यतिक्रांतो यो राज्ञा समयः कृतः ॥९॥

नेत्र उघडल्यावर समोर विशाल समुद्र : वानरीं उघडोनिंया नेत्र । पाहती तंव पुढें समुद्र । अतिशयेंसीं दुर्धर । गर्जे घोर गडगडां ॥४०॥ पुढें देखोनि समुद्र । विस्मयो करिती वानर । येथें कैसेनि आलों समग्र । केलें विचित्र तापसियें ॥४१॥ नाहीं चालविलें धरोनि करीं । नाहीं घेतलें कडेवरी । आम्हांसी विवराबाहेरी । कैसेपरी[4] आणिलें ॥४२॥ पुच्छीं बांधोनि समस्त । हनुमंते नेलें विवरांत । तैसेंहि नाहीं केलें येथ । न हालत आणिलें ॥४३॥

शोध करतात तो तापसी व विवर अदृश्य : येव्हढें लाघव जीपासीं । केउती[5] आहे ती तापसी । पाहतां न दिसे चौपासीं[6] । वानरांसी अति विस्मय ॥४४॥ अति आवेशें वानरवीर । वन शोधितां समग्र । ना तापसी ना तें विवर । विस्मय थोर वानरां ॥४५॥ निरसावया[7] वानरभ्रांती । तापसी नव्हे ती श्रीरामशक्ती । कृपेनें आली विवराप्रती । वानरपंक्ती तारावया ॥४६॥ मयमायेच्या मायिकशक्तीं । विवरी वानरां अति भ्रांती । रामनामाच्या आवर्तीं[8] । विवरनिर्मुक्ति वानरां ॥४७॥ करितां श्रीरामाची भक्तीं । भक्तां बांधूं न शके भ्रांती । रामनामाचिये ख्यातीं । विवरोन्मुक्ति वानरां ॥४८॥ श्रीरामाच्या नामभेणे । माया पळे घेवोनि प्राणे । स्थिर बापुडे तें कोणे । भक्तजन भुलवावया ॥४९॥ क्षुधार्थे हनुमंताची भक्ती । तापसी पावली नित्यमुक्ती । यालागीं हरिभक्तसंगती । भवनिर्मुक्ति भाविकां ॥५०॥ तापसी तरली वानूं किती । रामानामाच्या आवर्तीं । वानरीं विवरीं केली ख्याती । सावधानवृत्तीं अवधारा ॥५१॥ नामें गर्जती वानर । नामें कोंदलेसें विवर । तेणें जाला विवरोद्धार । जगदुद्धार रामनामें ॥५२॥ भक्त ज्या ठायासी जाती । तो ठाव नित्यमुक्ती । रामानामाच्या आवर्तीं । उद्धरती जड जीव ॥५३॥ वनीं वानर पाहती । नामें विवरा नित्यमुक्ती । वानरां विवराची अप्राप्ती । जड उद्धरती रामनामें ॥५४॥ यापरी ते वानर । करोनि विवराचा उद्धार । स्वयें पावले समुद्रतीर । सीता सुंदर शोधावया ॥५५॥ मागें शोधिलें गिरिगव्हर । तेथें न लभेचि सीता सुंदर । पुढें ओढवला समुद्र । अति दुस्तर वानरां ॥५६॥

एक महिन्याचा अवधी संपला, परत जाऊन सुग्रीवाचा अवमान होईल म्हणून तेथेच बसून प्रायोपवेशन : सुग्रीवें केली मासावधी[9] । ते लोटली विवरामधीं । तेथेंही न लभे सीताशुद्धी ।

शब्दार्थ : १. संसारापासून मुक्तता, २. प्रारब्धयोगाने, ३. गुहेतून बाहेर पडण्यासाठी, ४. कशा रीतीना, ५. कोठे, ६. चारीबाजूंना, ७. नाहीशी करण्याकरिता, ८. सतत, क्रमाने, ९. एक महिन्याची मुदत.

कार्यविधि नव्हेचि ॥५७॥ सीताशुद्धि न होतां पूर्ण। आम्हांसी जातां परतोन । सुग्रीव करील अपमान । आज्ञोल्लंघन रायाचें ॥५८॥

नरेंद्रेणाभिषिक्तोस्मि रामेणाक्लिष्टकर्मणा । स पूर्वं बद्धवैरो मां राजा दृष्ट्वा व्यतिक्रमम् ॥१०॥

घातयिष्यति दंडेन तीक्ष्णेन कृतनिश्चयः । इहैव प्रायमाशिष्ये रम्ये सागररोधसि ॥११॥

सीताशुद्धीलागीं जाण। शतधा शोधली दक्षिण। पुढें समुद्र अति दारुण। गतिगमन खुंटलें ॥५९॥ पुढें गति खुंटली उदधीं। आतां न लभे सीताशुद्धी । मागें जावों नये त्रिशुद्धी । प्राणावधि वानरां ॥६०॥ ऐसें बोलोनि अंगद । दुःखें दुर्धर करी खेद। अवश्य मज करील विरोध। तोही संबंध अवधारा ॥६१॥ युवराजा तूं त्रिशुद्धी। तुजअधीन वानरमांदी[१]। न करितांचि सीताशुद्धी । मजचि आधीं दंडील ॥६२॥ थोर करील अवकळा[२]। रासभारोहण मुख्य तो सोहळा । उपानहमाळा[३] गळां । गोमयगोळा[४] अभिषेक ॥६३॥ सोसितां अवकळा दारुण। लोकलज्जा येईल मरण। यापरीस येथें आपण । द्यावा प्राण तें श्रेष्ठ ॥६४॥ सीताशुद्धि न होतां दृढ। मुख्यत्वें माझी न राखे भीड । इतरांचा कोण पाड। दुःख दुर्वाड वानरां ॥६५॥ धन्य जटायु तो जाण । रावणासीं करोनि रण । सीता सांडवोनि आपण । दिधले प्राण रणरंगीं ॥६६॥ ऐकोनि अंगदाची गोष्टी । वानरीं भया घेतलें पोटीं । प्राण त्यजावा सिंधुतटीं। अवकळा मोठी कोण सोसी ॥६७॥ देहलोभे वांचों जातां । अवकळा बैसेल माथां। रामस्मरणें प्राण जातां । परमार्थ पावेन ॥६८॥ यालागीं आम्ही अवघे जणें। अश्वमेव प्राण देणें । घालोनियां कुशास्तरणें । मरणा धरणें बैसलें ॥६९॥

उपविष्टास्तु ते सर्वे यस्मिन्प्रायं गिरिस्थले । हरयो गृध्रराजस्य तं देशमुपचक्रमुः ॥१२॥

**समुद्रतीरावर बसले असता संपातीची भेट संपातीचा त्यांना प्रश्न :** तृण घालोनि मुष्टिमुष्टी। प्रायोपवेशें[५] समुद्रतटीं । वानर पडतां कोट्यनुकोटीं । देखिले दृष्टी संपातीनें ॥७०॥ जे जे आले समुद्रतीरा । तो तो संपातीचा चारा । वेगीं भक्षावया वानरां। संपाती त्वरा तेथें आला ॥७१॥ तो बहुतां दिवसांचा उपवासी । देवें कृपा केली कैसी । मज भक्षावया वानरांसी । या ठायासी आणिलें ॥७२॥ संपाती पुसे स्वयें आपण । या ठाया जे आले जाण । माझें भक्ष्य त्यांसी मरण । तुम्ही येथें कोण कोणाचे ॥७३॥ तृणास्तरणीं समुद्रतटीं । वानरांच्या कोट्यनुकोटी । पडोनि करिती श्रीरामाच्या गोष्टी। नाहीं पोटीं मरणभय ॥७४॥ माझेनि अति उग्र दर्शनें। प्राणियांते प्राणांत पळणें । तुम्ही गजबजाना मनें। मरणा धरणें कां बैसलेती ॥७५॥ तुम्ही काय मरों टेंकलेती । जे या ठाया आणिलेती। ते माझे भोजनप्रयुक्तीं। वानरपंक्ती मराल ॥७६॥ करितां रामनामचावटी । सांगा श्रीराम कोण तो सृष्टीं । तुम्हांसी कोठे जाली भेटी। समूळ गोष्टी मज सांगा ॥७७॥

**अंगदाकडून उत्तर, वृत्तान्तकथन व स्वयंदान :** ऐकोनि संपातीचें वचन । अंगद म्हणे आम्ही धन्य । अनायासें आलें मरण। गृध्रभक्षण वानर ॥७८॥ अन्नोदकें त्यजून प्राण । चरफडोनी द्यावा जाण। श्रीरामें कृपा केली पूर्ण । आलें मरण अनायासें ॥७९॥ अंगद म्हणे संपातीसी। श्रीरामकथा कां पुससी । तूं आजि अतिथ आम्हांसी । वानरांसी सुखें भक्षीं ॥८०॥ क्षुधितांसी[६] द्यावे अन्नदान। हें तंव शास्त्र सनातन[७]। आम्हीं तुज दिधले देहदान। करीं भक्षण वानरां ॥८१॥

**वृत्तान्त ऐकून संपातीचे हृदयपरिवर्तन, रामनामाचा महिमा, रामांचा व वानरांचा संबंध संपाती विचारतो :** संपाती बोले आपण। तुम्ही करितां रामस्मरण। माझेनि न करावे भक्षण। नाम रक्षण भक्तांसी ॥८२॥ जेथें रामनामस्मरण। तेथें रिघों न शके मरण। माझेनि न करवे भक्षण।

शब्दार्थ : १. वानरसमूह, २. दुर्दशा, ३. जोड्यांची माळ, ४. शेणमार करून, ५. सर्वस्वत्यागपूर्वक मरणार्थ बसून, ६. भुकेलेल्यांना, ७. अनादिसिद्ध असे.

नाम रक्षण निजभक्तां ॥८३॥ रामनामाचिया स्मरणीं । जन्ममरणां महापळणी । श्रीरामभक्त तुम्हीं निर्वाणीं। भाग्यें माझ्या आलेती ॥८४॥ मुखीं रामनामावृत्ती । हृदयी श्रीरामाची प्रीती । देह विकिलें श्रीरामभक्ती । भाग्य किती मी वानूं ॥८५॥ अतिथीचे निजभोजनीं। तुम्हीं समस्त देहदानी । श्रीरामभाग्यें सभाग्य जनीं । धन्य त्रिभुवनीं तुम्ही एक ॥८६॥ कोण कार्याचिये[1] विधीं[2]। तुम्ही आलेती सभाग्यनिधी । तें मज सांगावें त्रिशुद्धीं । कार्यसिद्धी मी करीन ॥८७॥ अत्यंत आवडी माझें पोटीं । ते मी पुसेन गुह्यगोष्टी । तुम्हीं श्रीराम देखिला दृष्टी। कैसेनि भेटी श्रीरामीं ॥८८॥ श्रीराम राजा ईश्वरेश्वर। तुम्ही वनचरें वानर । कैसेनि रामभजनीं तत्पर । सविस्तर मज सांगा ॥८९॥

वानरांना आश्चर्य, हनुमंताचा प्रश्न : ऐकोनि संपातींचे वचन। वानर जाले विस्मयापन्न। करिता रामनामस्मरण । गीध भक्षण करूं न शके ॥९०॥ जे आले या समुद्रतीरा । तो तो संपातीचा चारा। त्यासी भक्षवेना वानरां। श्रीरामचंद्राचेनि नामें ॥९१॥ करितां रामनामस्मरण। स्मरत्या मारूं न शके मरण। आम्ही अभागी संपूर्ण । रामस्मरण न करवे ॥९२॥ करितां नित्य नामस्मरण । मृत्यु त्याचे वंदी चरण। आम्हांसी प्रत्यक्ष प्रमाण। गिधा भक्षण न करवे ॥९३॥ मरण न ये रामनामोक्तीं । समुद्र बापुडें तें किती । नामस्मरणाची निजशक्ती । अपांपती[3] आम्हीं लंघूं ॥९४॥ धरोनि नामाचा निर्धार। आम्ही तरूं भवसागर । तेथें कायसा समुद्र । भाग्यें हा गृध्र भेटला ॥९५॥ ऐकतां नामाची निजख्याती । उल्लास हनुमंताचे चित्तीं। लंघावया अपापती। पुसे संपातीस नाममहिमा ॥९६॥ तूं अंडज पक्षी पूर्ण । रामनामीं नाहीं मरण। हें तुज कैसेनि गुह्य ज्ञान । मूळकथन मज सांगें ॥९७॥ श्रीरामभक्तांचे संगतीं। संपतीची गेली भ्रांती । पूर्वस्मरणाच्या[4] अनुवर्ती । मारुतीप्रति सांगत ॥९८॥

संपाती हा जटायूचा बंधू, तारुण्यातील पराक्रम : कश्यपाच्या निजकुळीं। अरुणवीर्याच्या समेळीं। जटायु संपाती बंधु जावळी[5]। आतुर्बळी जन्मलों ॥९९॥ दैत्य दानव मानव प्रौढीं। सहित देव तेहतीस कोडी। आमचे दृष्टीस घुंगरडीं। बळाची गाढी अति मस्ती ॥१००॥

आदित्यमनुधावंतौ ज्वलंतं रश्मिमालिनम् । आवामाकाशमार्गेण जवेनोपगतौ भृशम् ॥१३॥
मध्यं प्राप्ते तु सूर्ये वै जटायुरवसीदति ॥१४॥

अंगीं बळाची आंगवण। त्यावरी आलें तरुणपण। पैज घालोनि दोघे जण। सूर्यचरणवंदनार्थ॥१॥ पक्षबळाचेनि झडाडें। एक धांवे एकापुढें। एक एकावरी चढे। सभानु[6] पुढें लक्षोनि ॥२॥ वेगें येतां सूर्यापासीं। तंव तो मध्यान्हासीं। जटायु जाला कासाविसी। रविकिरणेंसी पोळोनि॥३॥ तो रिघाला मजतळीं । मी श्लाघलों[7] तये वेळीं । तंव पंखांची जाली होळी । गर्वमेळीं श्लाघ्यता ॥४॥ जटायूचे वांचले पंख। माझ्या पंखांची जाली राख। बाप गर्वाचें कौतुक। परम दुःख पावलों ॥५॥

संपातीचे पंख जळून त्याची असहायता : माझ्या पंखांची होतां होळी । थोर दिधली म्या आरोळि । अरुणें देखतां तये वेळीं । थोर कळवळी पुत्रस्नेहें ॥६॥ सूर्याप्रति सांगे अरुण। माझे पुत्र दोघे जण । स्वामीचें वंदूं येतां चरण । पक्षदहन केलें तेजें ॥७॥

अरुणास सूर्याचे वरदान : भूतळीं जन करिती नमन। ते मी देखेन स्वयें सुभान। मज दाविता अंगवण । गर्वे दहन दोहीं पक्षां॥८॥ माझे तेजाचे निजदीप्तीं। गर्वी तितुके भस्म होती । अरुणा तुझी हे संतती। म्हणोनि संपाती वांचला ॥९॥ अरुणा तुझें राखावया मन। पुत्ररक्षार्थ[8] देतों वरदान। तें तूं ऐक सावधान । पुत्रसंतान उद्धारा॥१०॥ तूं तंव माजा

शब्दार्थ : १. कोणत्या कामासाठी , २. अखेरीस, ३. समुद्र, ४. पूर्वस्मरण होऊन, ५. जुळे, ६. सूर्य, ७. प्रौढी मिरविली, ८. पुत्राचे रक्षणाकरिता.

निजसारथी। मज तुज नित्य एक गती। तुझी उद्धरावया संतती। शुद्ध वरदोक्ती अवधारीं ॥११॥ श्रीरामभक्तांचे संगीतीं। ऐकतां रामनामवचनोक्ती । निरभिमानें पक्षप्राप्ती। स्वयें संपाती पावेल ॥१२॥ होतां रामनामश्रवण। उभयपक्षीं निरभिमान। पक्ष पावोनि पूर्ण। अगम्य गमन करील॥१३॥ निरभिमान पक्षप्राप्ती । आगमनिगमअगम्यगती । येथें पावेल संपाती । सुखानुभूति[1] श्रीरामें ॥१४॥ रामनामें दुःख निवृत्ती। रामनामें सुखसंपत्ती। रामनामें अगम्यगती । जाण निश्चितीं सारथिया॥१५॥ जेथें श्रीरामआगमन। जटायु पावेल जनस्थान। करितां सीतासंरक्षण। रामें उद्धरण जटायू ॥१६॥ दशरथकौसल्येच्या कुशीं। श्रीराम अवतरेल सूर्यवंशीं। यालागीं मैत्री दशरथासीं । करि विश्वासीं जटायु।॥१७॥ जनस्थानामाझारी। जटायु गेला पक्षेंकरीं । दक्षिणसमुद्राचे तीरीं । मी विंध्याद्रि तेथें पडलों ॥१८॥ दग्धपक्ष देहव्यथा। काय खावें हें नित्य चिंता। राम नाठवेचि सर्वथा। वरदवार्ता विसरलों॥१९॥ नेणें मी जटायु गेला केउता[2] । तोही नेणे माझी वार्ता। जटायु धन्य तुम्ही बोलतां। आजि म्यां आतां आयकिलें ॥२०॥

संपातीने विचारल्यावरून हनुमंत जटायूचा वृत्तांत सांगतात ; कृपा करावी हनुमंता। म्हणोनि चरणीं ठेविला माथा। जटायूची समूळ कथा। मज तत्वतां सांगावी ॥२१॥ ऐकोनि जटायूचें नाम । संपातीसी आलें प्रेम। धन्य धन्य जटायूचा धर्म । तेणें श्रीराम सेविला ॥२२॥ मी करंटा पक्षहीन । राम नाठवे पापी पूर्ण । धन्य धन्य वानरांचें दर्शन । श्रीरामश्रवण मज जालें ॥२३॥ श्रीरामाची कवण स्थिती। जटायूची कवण गती । तुम्ही अवघे प्राणत्यागार्थी[3]। येथें कां आलेती तें सांगा ॥२४॥

नामधेयमिदं भ्रातुः श्रीरामोऽपि मया श्रुतः । तत्त्वमिच्छाम्यहं श्रोतुं विनाशं बांधवस्य च ।१५॥

सात शतां वर्षांपाठीं। तुम्हां वानरांच्या वाक्पुटीं[4]। ऐकिली जटायूची गोष्टी। ज्याची मज पोटीं मोठी चिंता ॥२५॥ जटायु पडला कवणे स्थितीं । जटायूची कवण गती । ऐसी चिंता वाहतां चित्तीं। शुद्धि निश्चितीं आज जाली॥२६॥ रावणें करितां सीताहरण। जटायुरावणांसी रण। कैसेनि जटायु पावला मरण। श्रीरामें उद्धरण कैसें केलें ॥२७॥ जटायूसी बळ संपूर्ण। मारूं न शके त्यासी रावण। कैसेनि जटायु पावला मरण । समूळ कथन मज सांगा॥२८॥ ऐकतां संपातीची वार्ता। कृपा उपजली हनुमंता । जटायूची समूळ कथा। होय सांगता स्वानंदें ॥२९॥ दाशरथि श्रीरघुनंदन । पितृवाक्यें वनाभिगमन। सीता समवेत लक्ष्मण । आला ठाकून जनस्थाना॥३०॥ जाली जटायूसी भेटी। स्वामिसेवकां पडिली मिठी। आश्रम केला गंगातटीं । पंचवटीं अति रम्य ॥३१॥ रामाश्रमीं अहोरात्र। जटायु जाला घरटीकार[5] । जानकी जननी अति सुंदर । अष्टौप्रहर संरक्षी ॥३२॥ जटायु गेला वनभ्रमणा । मृगें छळिलें रामलक्ष्मणां । भिक्षामिषें पैं रावण । सीताहरण तेणें केलें ॥३३॥

ददर्श सीतां वैदेहीं ह्रियमाणां विहायसा । रावणं विरथं कृत्वा मोचयित्वा च जानकीम् ॥१६॥

छलेन युद्धधर्मेण रावणेन हतो रणे ॥१७॥

सीता आक्रंदतां जाण । जटायु आला पैं धांवोन। रावणेंसीं केलें रण । अति निर्वाण तें ऐका ॥३४॥ भंगिलें चाप छेदिले शर । मारिले पिशाचवदन खर । झडपा हाणोनि रहंवर[6]। अति सत्वर भंगिला॥३५॥ शिरींचा पाडोनियां मुकुट। दहाही झांबाडिले कंठ। रावणा भुलवोनि वाट । प्राणसंकट मांडिलें ॥३६॥ नखक्षतीं[7] वाहे रुधिर[8] । वीस भुजा केल्या चूर । सोडवोनि सीता सुंदर। दशशिर गांजिला ॥३७॥ जटायु पुरे पुरे रण । माझा निघों पाहे प्राण। रावण दांतीं धरोनि तृण । जीवदान मागतसे ॥३८॥ रावण स्वयें आला शरण।

शब्दार्थ : १. सुखाचा अनुभव, २. कोठे, ३. प्राण देण्याच्या उद्देशानें, ४. तोंडाने, ५. राहणारा, ६. रथ, ७. नखांच्या ओरखड्यांनीं, ८. रक्त.

जटायु त्याचा न घे प्राण । रक्षिला शरणागत म्हणोन। सीता घेऊन सोडिला ॥३९॥ पक्षें गांजिलें निश्चितीं । धुळीं मिळाली यश:कीर्ति। रावण परतला पुढती। छळणार्थी पणयुद्धें ॥४०॥ घालोनि श्रीरामाची आण। जटायूस मृत्यु पुसे रावण । वामचरणांगुंष्ठीं माझें मरण। सांगे आपण छळणोक्तीं ॥४१॥ ऐकतां निजबंधूची ख्याती। उल्लास संपातीचे चित्तीं। तंव तंव निजपक्ष वाढती । जेंवी वसंतीं वृक्षांगें ॥४२॥ श्रीरामाची निर्वाण आण । जटायु मानोनि प्रमाण। उभयपक्षीं सांगे मरण। युद्धा रावण पेटला ॥४३॥ जटायूनें एकाएक । अंगुष्ठ छेदिला सनख। रावणें उपडिले दोनी पंख। पावला दु:ख जटायु ॥४४॥ पक्षोत्पाटीं यावें मरण । घ्यावया श्रीरामाचे दर्शन । करितां श्रीरामनामस्मरण। कंठीं प्राण राखिला ॥४५॥ श्रीराम कृपाळु पैं पूर्ण । राखता जटायूचा प्राण। तेणें धरोनियां चरण । युक्तवचनीं विनविलें ॥४६॥ तुजपुढें त्यजितां प्राण। मी होईन ब्रह्म पूर्ण। पुढें वांचल्याला भाग्य कोण। ऐसें मरण मग कैंचें ॥४७॥ ऐकता जटायूचें वचन । श्रीराम जाला सुप्रसन्न । देहीं विदेही ब्रह्मपूर्ण । जाला आपण जटायु ॥४८॥ ऐशापरी श्रीरघुनाथें। उद्धरोनि जटायूतें । पुढें सीतेच्या शुद्धीतें । आले निश्चितें किष्किंधें ॥४९॥ तेथें वधोनि वाळीसी। राज्य दिधलें सुग्रीवासी । यौवराज्य अंगदासी । वाळिसुतासी दिधलें ॥५०॥ तो अंगद दक्षिणेप्रती। सवें देवोनि जुत्पती[1]। रामें धाडिले सीताशुद्ध्यर्थी। यावें मासांतीं मर्यादा ॥५१॥ दक्षिण शोधितां समस्त। सीताशुद्धि न लभे येथ। मर्यादा लोटली विवरांत। तेणें धाकत अवघेही ॥५२॥ अवकळा करोनि थोर। सुग्रीव दंडील महाक्रूर। तेणें भयें हे वानर । आले समग्र प्राणत्यागासी ॥५३॥ शुद्धि न लभेचि सीता। काय सांगावें श्रीरघुनाथा। थोर बैसली लज्जा माथां । प्राणत्यागार्था येथे आलों ॥५४॥ ऐकोनि हनुमंताचें वचन । संपाती घाली लोटांगण। तुम्ही त्यजूं नका प्राण। सीता सांगेन मी तुम्हां ॥५५॥ तुम्ही श्रीरामसेवक। माझे भवपाशमोचक। मी तंव चरणरजरंक। शुद्धि निर्दोष अवधारा ॥५६॥ शतयोजनें समुद्रपारीं। लंकागडदुर्गामाझारीं। अशोकवनाभीतरीं । सीता सुंदरी दिसताहे ॥५७॥ रामनाम नित्य वाक्पुटीं[2]। रामस्मररणाच्या निजदृष्टीं । पैला पाहें सीता गोरटी। मज निजदृष्टीं दिसताहे ॥५८॥ मज जैं पंख असते येथ। मर्दोनियां लंकानाथ। सीता आणितों मी त्वरित। श्रीरघुनाथ सुखार्थ ॥५९॥ ऐसें बोलतां वचन । संपातीसी निरभिमान । पक्ष निघालें संपूर्ण । वरदान सूर्याचें ॥६०॥ स्वयें देखतां वानरगण । पक्ष निघाले निरभिमान । निरभिमानाचें निजचिन्ह । सावधान अवधारा ॥६१॥ मर्दोनियां लंकापती । म्यां आणावी सीता सती । जगीं होईल अति ख्याती । हेही अहंकृती[3] त्या नाहीं ॥६२॥ सोडवोनि सती सीता । सुख द्यावें श्रीरघुनाथा । मी एक सेवक पढियंता[4]। हेही अहंता त्या नाहीं ॥६३॥ निरभिमानाची निजकळा । मीतूंपण न दिसे डोळां। श्रीराम मजहूनि वेगळा। कदाकाळ स्मरेना ॥६४॥ श्रीरामभक्तांचे संगतीं। संपातीसी येवढी प्राप्ती। ऐकतां ती श्रीरामकीर्ती । निजविश्रांती पावला ॥६५॥ निरभिमानाचें गमन। लंघोनियां त्रिभुवन। भूगोल भेदोनियां जाण। जाला परिपूर्ण परब्रह्म ॥६६॥ ऐकोनि श्रीरामाची कीर्ती। पशु पक्षी उद्धरती। वनाभिगमन श्रीरघुपती। त्रिजगतीं उद्धार ॥६७॥ एकाजनार्दना शरण। श्रीरामनामें ब्रह्म पूर्ण। कथा ऐकतां रामायण । उद्धरण जड जीवां ॥६८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणें किष्किंधाकांडे एकाकारटीकायां संपातिउद्धरणं नाम षोडशोऽध्याय: ॥१६॥ ओंव्या ॥१६८॥ श्लोक ॥१७॥ एवं ॥१८५॥

---

शब्दार्थ : १. योद्धे, २. मुखामध्ये, ३. गर्व, ४. आवडता

# अध्याय सतरावा

॥ श्रीसीतारामाभ्यां नमः ॥

## हनुमंताचे समुद्रावरून उड्डाण

आख्याता गृध्रराजेन समुत्पत्य प्लवंगमाः। संगताः प्रीतिसंयुक्ता विनेदुः सिंहविक्रमाः ॥१॥

संपातीकडून सीतेची माहिती मिळाल्यामुळे वानरांना आनंद : संपातीनें सीताशुद्धी। यथार्थ सांगितली बुद्धी। तेणें वानरांची मांदी[1]। जयजयशब्दीं गर्जत ॥१॥ मिळोनि वानरांचा भार। सिंहनादाहूनि थोर। करिते जाले भुभु:कार। सीता सुंदर सांपडली ॥२॥ येरयेरां आलिंगन। येरयेरां अभिवंदन। सीता सांपडली चिद्रत्न। हर्षे उड्डाण करिताती॥३॥ आमच्या कष्टांची जाली सिद्धी। आजि पावली सीताशुद्धी। म्हणोनि वानरांची मांदी। हर्षानुवादीं डुल्लत ॥४॥ येरयेरां दाविती वांकुल्या। येरयेरा करिती गुदगुल्या। सत्य सीताशुद्धी जालिया। आमची फिटली आशंका॥५॥ अंगदें बैसोनि सपरिवार। शतयोजन हा सागर। उल्लंघों शके कोण वीर। तो विचार मांडिला॥६॥ पाचारोनियां जुत्पती[2]। समुद्रलंघनाचा अर्थी। कोणासी किती आहे शक्ती। तं समस्तीं सांगावें ॥७॥

अथांगदवचः श्रुत्वा सर्वे वानरपुंगवाः। स्वां स्वां गतिं समुत्साहमूचुस्तत्र समाहिताः ॥२॥

गजो गवाक्षो गवयः शरभो गंधमादनः। मैंदश्च द्विविदश्चैव सुषेणो जांबवान्नलः ॥३॥

अंगदाच्या प्रश्नावरून वानरांचा पराक्रम : ऐकोनि अंगदवचनोक्ती। अकरा जण सेनापती। समुद्रलंघनाचे अर्थीं। आपुलाली शक्ती सांगती॥८॥ गज सांगे निजनिर्वाण[3]। दश योजनें मज उड्डाण। गवाक्ष बोले प्रमाण। त्याहूनि द्विगुण शक्ति माझी ॥९॥ शरभ सांगे अति निगुतीं। तीस योजनें माझी शक्तीं। चाळीस योजनांची गती। बोले पुरुषार्थी[4] वृषभ तो ॥१०॥ शक्ति बोले गंधमादन। पन्नास योजनें मज उड्डाण। मैंद बोलिला आपणसाठी योजनें शक्ति माझी॥११॥ द्विविद बोले आपुली थोरी। उड्डाण योजनें सत्तरी। सुषेण महावीर वानरीं। सरीं[5] नांवावरी नेवों नये॥१२॥ तारेचा पिता जो सुषेण। पश्चिमशोधा धाडिला जाण। त्याचेनि नांवें वीर आन। त्याचें उड्डाण चार विसा॥१३॥ सांगावया निजपुरुषार्थ। लज्जायमान जांबवंत। सुखी न करवेचि श्रीरघुनाथ। बळाचा घात वार्धक्यें[6] ॥१४॥

जांबवंताचा पराक्रम : मज तारुण्यावस्था असती। तैं आणूनि सीता सती। सुखी करितों श्रीरघुपती। गेली शक्ती वार्धक्यें ॥१५॥

किंतु वक्ष्याम्यहं वीर्यमात्मनो यौवनोदये। सुषेणेन मया चैव वलियज्ञे सनातनः ॥४॥

प्रदक्षिणीकृतः पूर्वं क्रममाणस्त्रिविक्रमः। विक्रमेण मया तात सशैलवनकानना ॥५॥

त्रिःसप्तकृत्यःपृथिवी परिक्रांता प्रदक्षिणम् ॥६॥

माझे तारुण्यपुरुषार्था। माझा मी सांगेन आतां। करूं नका उपहासता[7]। समूळ कथा अवधारा॥१६॥ बलियज्ञीं नारायण। वामनरूपी जावोनि आपण। करावया बळीचें छळण। जाला आपण त्रिविक्रम॥१७॥ तेणें काळीं मी आणि सुषेण। दोघां पूर्ण तारुण्यपण। करावया त्रिविक्रमप्रदक्षिण। दोघे जण निघालों॥१८॥ त्रिवार करितां प्रदक्षिण। सुषेणाची शक्ति क्षीण। चालतां मेटें[8] वळली[8] जाण। मूर्च्छापन्न तो पडिला ॥१९॥ ते काळीं माझीं आंगवण। लक्षोनि त्रिविक्रमचरण। पृथ्वी सशैलवनकानन। केलें प्रदक्षिण त्रिःसप्त[9] ॥२०॥ एकवीस वेळां एके उच्छ्वासीं। करोनि पृथ्वीप्रदक्षणेसी। सर्वेचि गेलों कैलासासी। महेशासी वंदावया ॥२१॥

शब्दार्थ : १. समुदाय, २. मोठेमोठे, ३. दृढनिश्चयाने, ४. पराक्रमी, ५. बरोबरी, ६. वृद्धपणाने, ७. धिक्कार, निंदा ८. अवसान खचले, ९. एकवीस वेळा.

गत्वा वेगेन कैलासमागतो विबुधालये । दैत्यः पर्वतहस्तः सन्देवेंद्रमभिपद्यत ॥७॥
बलदैत्यो मम पिता देवेंद्रेण हतः पुरा । इत्युक्त्वा पर्वतं तस्मै चिक्षेपासुरनंदनः ॥८॥
ततः पतनखेदात्तु पर्वतो जानुना धृतः । तेन भग्नश्च जानुर्मे जातोऽहं न्यूनविक्रमः ॥९॥
स कदाचिद्गतो हंतुं विबुधानृषिस तमान् । बलपुत्रमहं हत्वा क्रोधान्मृत्युमिवापरम् ॥१०॥

बलकथन : वेगीं जावोनि कैलासासी । वंदोनियां महेशासी । बळपुत्र आला स्वर्गासी । इंद्रादिकांसी वधावया ॥२२॥ बळ दैत्य माझा पिता । इंद्रें वधिला अवचिता[१]। त्याचा सूड घेईन आतां । करीन घाता इंद्राच्या ॥२३॥ येणें रागें दैत्यसुतें। मारावया इंद्रातें । पर्वत उचलोनियां हातें । कोपें अद्‌भुत चालिला ॥२४॥ इंद्रे हाणितलें वज्रघातें[२]। वज्र झेलोनि डावे हातें । मग मारावया इंद्रातें । कोपें अद्‌भुत चालिला ॥२५॥ बळपुत्र महाबळी । पर्वत झेलोनि करतळीं । करावया इंद्राची रांगोळी । क्रोधानळीं[३] चालिला ॥२६॥ येतां देखोनि गिरिवर । स्वर्गीं कांपती सुरवर[४]। तों म्यां झेलिला सत्वर। उडी अति शीघ्र घातली ॥२७॥ पर्वत झेलिला त्वरेंकरी[५]। तो निसटला दोहीं करीं। मग म्यां धरिला जानूंवरी । अमरपुरी वांचविली ॥२८॥ क्रोधें येतां बळपुत्रासीं। म्या दृढ युद्ध केलें त्यासीं । माझें बळें होतां कासाविसी । लघु लाघवेंसीं पळूं पाहे ॥२९॥ पर्वतघातें भग्नचरण[६] । तेणेंसी शीघ्र करोनि उड्डाण। बळपुत्राचा घेतला प्राण। तेणें सुरगण सुखावले ॥३०॥ तैंपासूनि भग्नचरण। माझी वार्धक्यें शक्ति क्षीण । तरी समुद्रीं उड्डाण। नव्वद योजनें करीन ॥३१॥

नल, नीळ जांबवंत वीर्यकथन : नळ बोलिला आपण । समुद्रामाजी उड्डाण। सत्याण्णव योजनें करीन जाण । त्यावरी त्राण मज नाहीं ॥३२॥ नीळ बोलिला वचन । एकें उड्डाणें शत योजन । करीन समुद्रोल्लंघन। हे आंगवण पैं माझी ॥३३॥ वालिसुत राजकुमर । अंगद जो कां महावीर । समुद्रोल्लंघनप्रकार। निजनिर्धारें सांगत ॥३४॥ शतयोजनें अब्धिलंघन। एक उड्डाणें करीन जाण। पुढती यावयालागीं जाण। संदेहापन्न[७] मति माझी ॥३५॥ एके उड्डाणें उठाउठीं । जाईन समुद्रपरतटीं[८]। तेथें आलिया राक्षसथाटी[९] । युद्ध निजनेटीं होय नव्हे ॥३६॥ माझें अंगीं बाळपण । नाहीं निवडली आंगवण । तरी स्मरोनि श्रीरामचरण । सीता साधीन क्षणमात्रें ॥३७॥ करितां रामनामस्मरण। राक्षसें बापुडीं तीं कोण । कायसा बळियाढ रावण । सीता आणीन निमेषार्धें ॥३८॥ ऐकोनि अंगदाचें उत्तर । वानरीं केला जयजयकार । जुत्पती करिती जोहार। तूं राजकुमर आतुर्बळी ॥३९॥ आम्ही असतां सेवक सकळ। राजकुमर आणि तूं बाळ । समुद्रलंघनाचें स्थूळ[१०]। तुजवरी सळ[११] नयें घालूं ॥४०॥

जांबवंत हनुमंताची स्तुती करितो : अंगद म्हणे हें करितां । प्राण देणें लागेल समस्तां। सीताशुद्धीवीण जातां । अपमानता अनिवार ॥४१॥ तंव बोलिला जांबवंत ॥ हनुमंत वीर अति विख्यात । हा कां उगाचि असे पहात । अत्यद्‌भुत प्रतापी ॥४२॥ बाळपणीं आकळितां भानु। राहूचा निर्दळिला अभिमानु । याचा पिता प्रभंजनु[१२]। बळवाहनु हनुमंत ॥४३॥ त्यासीं गर्भीं ब्रह्मचर्यकौपीन । त्याचा देखणार रघुनंदन । माता अंजनी न देखे नग्न । ब्रह्मचारी पूर्ण कपिराज ॥४४॥

मारुतीचे उड्डाणकथन: ऐसें बोलतां जांबवंत। स्तवनें हरिखला हनुमंत। लांगूल त्राहाटिलें[१३] रोमांकित। आल्हादयुक्त उठिला ॥४५॥ शतयोजनें अब्धिलंघन[१४]। तें माझें पादक्रमण । तुम्हांसी संदेह तो कोण। सीता आणीन निमेषार्धें ॥४६॥ करोनि रावणा उपहती । राक्षसां लावोनियां ख्याती । प्रतापें आणीन सीता सती । श्रीरघुपतिसुखार्थ ॥४७॥ आणिक एक

शब्दार्थ : १. एकाएकी, २. वज्राचा आघात करून, ३. क्रोधाग्नीने, ४. मुख्य मुख्य देव, ५. घाईने, ६. लंगडा, ७. संशययुक्त, ८. समुद्राच्या दुसऱ्या तीरावर, ९. राक्षसांचा समुदाय, १०. मोठे, ११. संकट, १२. वायू, १३. आपटिले, १४. समुद्र उल्लंघून जाणे.

विचार । तुम्हांसी सांगेन साचार । जेणें सुखी होय रघुवीर । तोही प्रकार मी करीन ॥४८॥ अवज्ञेनें आणितां सीता। कोप येईल श्रीरघुनाथा। तरी गांजोनि लंकानाथा। शुद्धि मी आतां आणीन ॥४९॥

महासंहननोपेतौ महान्तौ पुरुषर्षभौ। ऋष्यमूकात्पुनः शैलादुभौ तौ रामलक्ष्मणौ ॥११॥
आनयिष्यामि वैदेह्याः सकाशं वानरर्षभ । आनयिष्यामि तां देवीं । रामस्य महिषीं प्रियाम् ॥१२॥

राक्षसासी राम लक्ष्मण। वीर शूर दोघे जण । सीतेपासीं मी नेईन जाण । सकुळी रावण निर्दळावया ॥५०॥ ऋष्यमूकपर्वताहूनि जाण। घेवोनियां राम लक्ष्मण । घालीन लंकेवरी उड्डाण । सकुळी रावण मारावया॥५१॥ अथवा मी आतुर्बळी । करीन राक्षसां रवंदळी[1]। सीता आणीन रामाजवळी। हरिखें[2] टाळी पिटित ॥५२॥ सीता आणीन रामापासीं। कां राम नेईन सीतेपासीं । अथवा शुद्धि आणीन तुम्हांपाशीं। या कार्यासी मी कर्ता ॥५३॥ लंकाद्वारीं रणकल्लोळीं । खेळेन शिरांची चेंडूफळी। लंकेची करीन होळी। तरी मी बळी हनुमंत॥५४॥ सीताशुद्धि ते तंव किती। यालागीं कायसी कुंथा-कुंथी[3]। सुखी रहावें समस्तीं। लंकेप्रती मी जातो ॥५५॥ ऐसें बोलोनि आपण। समस्तांसीं घालोनि लोटांगण। अंगदें दिधलें आलिंगन। गर्जे गगन आल्हादें ॥५६॥ कपी हरिखले समस्त । त्यांसी हनुमंत बोलत। माझा उड्डाण अंगवात । सहावया शक्त तुम्ही नव्हां ॥५७॥

न मे कोऽपि महावेगं प्लवने धारयिष्यति । एतानीह नगस्यास्य शिलासंकणशालिनः ॥१३॥
शिखराणि महेंद्रस्य स्थिराणि च महांति च । एतानि मम वेगं हि पादयोः प्लवगोत्तमः ॥१४॥

माझे उड्डाणाचे निजनेटें । महेंद्र पृथ्वीमाजी दाटे । पर्वतशिखरें होती पीठें । कडे कपाटें बुजतील ॥५८॥ उड्डाणाचा अंगवात । पर्वत तुटोनि तळीं पडत । शिखरें तृणप्राय उडत। वृक्ष उपडत समूळीं ॥५९॥ वृक्ष उपडोनि समूळीं । परिभ्रमती[4] अंतराळीं[5]। शुष्क पर्णें वाहुटळीं । तैशा वेळुजाळी उडतील ॥६०॥ उचंबळेल समुद्रजळ । तेणें तिमेल[6] ध्रुवमंडळ। दिग्गज कांपती चळचळ । अति तळमळ जळचरां ॥६१॥ अंगवाताचेनि घर्घरें[7]। बैसती मेघांचीं दांतोरें[8]। समुद्रगडगर्जनविसरें[9]। येतील शाहारे कळिकाळा॥६२॥ त्या नादाचा धाक मोठा । उमा झोंबेल नीळकंठा । रमा थापटी वैकुंठा[10]। भयसंकटा निवारीं॥६३॥ उड्डाणकाळ अति दुर्धर । सुर नर धाकती निशाचर । तेथें तुम्हीं गा वानर । कैसेनि धीर धराल ॥६४॥ यालागीं तुम्ही वानरगण। हात धरोनि अवघे जण। पर्वत कवळा सत्राण । तरीच प्राण उरतील॥६५॥ दक्षिणेचे पर्वतकडे । तुटोनि पडती झडाडें । तुम्हीं राहावें उत्तरेकडे । होवोनि गाढे सुलीन॥६६॥ जैसा श्रीरामचा बाण। तैसें करीन उड्डाण । लंकेमाजी प्रथम कंदन । बोहणी जाण मी करीन ॥६७॥ करीन इंद्रजितासीं सळ । तुकीन[11] रावणाचें बळ । राक्षसांचें अमित दळ । तें मी सकळ गांजीन ॥६८॥ पाडोनि राक्षसदांतांसी । त्यांच्या मी करीन राशी । मग मोजून कुंडवेंसीं। घालीन सळेंसी रावण ॥६९॥ घेतां लंकेची घरधांडोळी[12]। जरी न लभे जनकबाळी । लंका उपडोनी समूळीं । रामाजवळी आणीन ॥७०॥

इति तस्य ब्रुवाणस्य सर्वे वानरपुंगवाः । चक्रुः प्रशंसां मुदिताः शक्रस्येव मरुद्गणाः ॥१५॥
तस्य पुष्पवतीं चक्रुर्वनमालां महात्मनः । चफुस्ते वानरश्रेष्ठा ब्रहुभ्यां मंगलानि च ॥१६॥
स तैः परिवृतः श्रीमान्वानरैर्वानरर्षभः । आरुरोह नगश्रेष्ठं महेंद्रमरिमर्दनः ॥१७॥

**वानरांना आनंद व हनुमंताचे उड्डाण :** ऐसें हनुमंताचें वचन । ऐकोनियां वानरगण । हर्षे वंदिले त्याचे चरण । जेंवी मरुद्गण इंद्रासी ॥७१॥ श्रीरामस्मरणलीला । त्याचि सुमनांच्या

शब्दार्थ : १. चुराडा, नाश, २. आनंदाने, ३. खेद, ४. भोवतात, ५. आकाशात, ६. भिजेल, ७. घरघर शब्दाने, ८. दांताळी, ९. समुद्रगर्जनाच्या समूहाने, १०. विष्णूला, ११. अजमावून पाहीन, १२. घरांची झडती.

माळा । वानरी विचित्र घातल्या गळां । वनीं वनमाळा शोभत ॥७२॥ परिवारला[१] वानरभारीं । इंद्रासमान ज्याची थोरी । त्या चढला महेंद्रगिरीं । लंकापुरी लक्षोनी ॥७३॥ करोनियां श्रीरामस्मरण । देवोनि वानरां आलिंगन । करावयासी उड्डाण । आल्हाद पूर्ण हनुमंता ॥७४॥ मुखीं श्रीरामनाममुद्रा। हृदयीं धरोनि श्रीरामचंद्रा । उल्लंघावया समुद्रा। कपिकुंजरीं[२] आल्हाद ॥७५॥ पाहतां निजबाहूंचे त्राण । अंगा आलें निजस्फुरण । लांगूल त्राहटिता जाण । रोमांच पूर्ण थरकती ॥७६॥

उड्डाणाची प्रतिक्रिया : पुच्छ आदळितां बळी । शिळाशिखरां झाली रांगोळी। वृक्ष मिळाले पैं धुळी । पुष्पीं फळीं समवेत ॥७७॥ पक्षी कळकळती आकाशीं । महाप्रळय दिग्गजांसी । तरस तगर बिळवासी। सिंहसूकरांसी अति त्रास॥७८॥ उड्डाण करितां महाबळी। पर्वत दाटला[३] पायतळीं । तेणें तो रुपला भूतळीं । सर्प पाताळीं दडपलें ॥७९॥ अर्धसर्प दडपतां एक । बाहेर काढोनियां मुख । सक्रोध वमितां[४] पै विख। शिळा निःशेख भस्म होती ॥८०॥ जैसीं उभारिलीं छत्रें। सर्पफणा तदाकारें। अर्ध दडपिलीं शरीरें। फुफूत्कारें गर्जती ॥८१॥ सर्पीं वर्मितां पैं गरळ । उठती अग्नीचे कल्लोळ । विख सरलिया सकळ । अति विकळ तळमळती ॥८२॥ पर्वतीं दिव्यौषधी अनेक। दाटल्या स्त्रवती पीयूख चोख। तो रस लागताचि देख। निःशेष विख निमालें ॥८३॥ भारें दडपला पर्वतू । श्वेत पीत आरक्त धातू। धारावर्तीं पैं स्त्रवतू । तेणें शोभतू गिरिराज ॥८४॥ वामन जाला त्रिविक्रम । तैसा वाढला तो वानरोत्तम। दृढ धरिला आक्रम । पराक्रम स्वामिकार्या ॥८५॥ पर्वणीं[५] वाढे जेंवी समुद्र । तैसा वाढला कपींद्र। तेणें दचकला काळाग्निरुद्र । ऐसा भ्यासुर भासत ॥८६॥

समुद्रलंघनाचे कौतुक पाहण्यासाठी देवादिकांचा मेळावा जमला : समुद्रलंघनकौतुक । पाहूं आले ब्रह्मादिक । सुरवर दाटले अनेक । सिद्ध गुह्यक गंधर्व ॥८७॥ नानापरींच्या विमानपंक्ती। नभीं दाटल्या नेणों किती। कैसा कैसा उडेल मारुती। पहावया समस्तां आल्हाद ॥८८॥ उमा रमा आणि सावित्री। पाहूं आल्या नवही नारी । समुद्रामाजीं वानरीं । कैसेपरी उडिजेल ॥८९॥

उड्डाणाचे वर्णन : समुष्टि बाहु धरोनि पुढां। वळून पुच्छाचा आंकडा। बळें उडतां पैं माकडा । पडिल तडा[६] गिरीतटीं ॥९०॥ कडे खचले सागरीं। शिखरें उडालीं अंबरीं। समूळ वृक्ष वारेनिकरीं[७] । गगनांतरीं परिभ्रमत[८] ॥९१॥ जैसा बोळवोनि अति आप्त । सुहृद माघारे परतत । तेंवी पाषाण वृक्ष समस्त । मागें पडत सागरीं ॥९२॥ विकट वानरें दिधली हाक । दुमदुमिले तिन्ही लोक । कळिकाळें घेतला धाक । सुर साशंक विमानीं ॥९३॥ जाणोनि पवनाची शक्ती । उल्लंघोनि मनोगती । लंका लक्षोनि मारुती। शीघ्रगतीं निघाला॥९४॥ वेगें उडतां वानर। क्षोभें खवळला सागर। तेणें भुलले जळचर। येरां येर झोंबती॥९५॥ अंगवातें मारुती। खुंटली रविचंद्रांची गती। ग्रहनक्षत्रें डळमळिती । निजात्मगती खुंटली ॥९६॥ हनुमंताच्या अंगदीप्तीं । नभीं शशि सूर्य लोपती । नक्षत्रांच्या लाह्या होती। तेजें मारुती देदीप्यमान ॥९७॥ बाळसूर्याचा ओतिला । कीं शेंदुराचा रचिला । न तो कुंकुमाचा घडिला । तैसा देखिला हनुमंत ॥९८॥ हनुमंताच्या अंगप्रभा। नभत्व लोपताहे नभा। दिव्य तेजाचा निजगाभा । तैसी शोभा शोभत ॥९९॥ जैसा रामबाण नभाआंत । तैसा हनुमंत असे जात । साधावया स्वामिकार्यार्थ । त्वरान्वित मारुती ॥१००॥

हनुमंताच्या विश्रांतीसाठी जळातून वर यावे अशी सागराची मैनाद्रीला विनंती : जैसें तप्तचामीकर[९] ।

शब्दार्थ : १. वेष्टिला, २. वानरश्रेष्ठाला, ३. चेपला, दडपला, ४. ओकल्याने, ५. अमावस्येला व पौर्णिमेला, ६. भेग, फट, ७. वाऱ्याने, ८. भोवू लागले, ९. तापविलले सोने.

तैसा जातसे वानर। विश्रांति द्यावया सत्वर । सांगे सागर मैनाद्री ॥१॥ मी सागराचा स्थापित । सूर्यवंशाचा नित्यांकित । त्वरेनें जातसे हनुमंत । रामाकार्यार्थ साधावया ॥२॥

अस्य साह्यं मया देयमिक्ष्वाकुकुलवर्तिना । इक्ष्वाकुकुलजो रामो मम पूज्यतमः परम् ॥१८॥

कुरु साचिव्यमस्माकं विना कल्पात्ययो भवेत् । सलिलादूर्ध्वमातिष्ठ विश्रमेच्च यथा कपिः ॥१९॥

मज पूज्यता सूर्यवंशी । साह्य व्हावें हनुमंतासी। विसांवा द्यावया वानरासी । अति त्वरेंसीं भागला ॥३॥ यालागीं तुवां मैनाद्री। वेगीं निघावें जळाबाहेरी । संमुख निघोनि झडकरी । कपींद्रा करीं विश्रांती ॥४॥ हनुमान जातो त्वरेंकरीं[1] । विलंब होतां जाईल दूरी । इतकें माझें प्राधान्य करीं। देईं वानरा विश्रांती ॥५॥ विश्रांति दिधलिया वानरीं। सेवा उपतिष्ठे[2] श्रीरामचंद्रीं। पुढील मार्ग लंकापुरी। क्षणामाझारीं पावेल ॥६॥ ऐकें मैनाद्रि गिरिनाथा । विश्रांति दिधलिया हनुमंता । सुखसंतोष श्रीरघुनाथा। हें कार्य सर्वथा तुवं कीजें ॥७॥

**सागराच्या सांगण्यावरून मैनाद्री वर येतो :** ऐसें सांगतां सागर। उल्लासें वाढला गिरिवर। सुस्वादफळें अरुवार[3] । निर्मळ नीर कपिपूजा ॥८॥ विश्रांतिस्थळ अति प्रबळ । मंद सुगंध मलयानिळ । पंचम कूजती कोकिळ । झणत्कारें अलिकुळें ॥९॥ मागील जावोनि सकळ श्रम । पुढें विश्रांति पावे परम। ऐसा साधिला आराम। वानरोत्तम विश्रांती ॥११०॥ ऐसिया आरामकैवाडें[4]। हनुमंताच्या मार्गापुढें। गिरि वाढला वाडेंकोडें[5]। विश्रांतिचाडें कपींद्रा ॥११॥

**मैनाद्री व हनुमंत यांची उंच होण्याची स्पर्धा :** वाढला देखोनि पर्वत । उंच वाढला हनुमंत। गिरि वाढला मार्ग रोधित । त्याहूनि हनुमंत उंचावला ॥१२॥ जंव जंव पर्वत वरती वाढे। तंव तंव मारुती गगनीं चढे । श्रम न बाधी तयाकडे। विश्रांतिचाडे उदास॥१३॥ नभीं चढला योजनशत । द्विगुण वाढला पर्वत । हनुमंत चढला पांच शत । गिरिसप्त शत वाढला ॥१४॥ हनुमान चढला सहस्रवरी। इतकाचि वाढला गिरी। कपि चढला तयाहींवरी । समुद्रपरपारीं जावया ॥१५॥ गिरि वाढला लक्षकोटी । कपि चढला तयाहींवरी । समुद्रपरपारीं जावया ॥१५॥ गिरि वाढला लक्षकोटी । कपि चढला नभःपृष्ठीं । पर्वत स्वयें कपाळ पिटी। चरणभेटी मज नव्हे ॥१६॥

**मैनाद्रीची हनुमंताला प्रार्थना :** लंघोनि जातां हनुमंत। ग्लानी मैनाक विनवित। तूं कृपाळु श्रीरामदूत । उपेक्षित कां जासी ॥१७॥ तुझा लागलिया चरण । मी होईन अति पावन। यालागीं मी वाढलों गा जाण। नाहीं अभिमान तुजसीं मज ॥१८॥ सागरें सांगितलें मजप्रती। हनुमंता पूजावें अतिथी। यालागीं आलों मी तुजप्रती । द्यावया विश्रांति रामभक्ता ॥१९॥ सगरें स्थापिला साचार। यालागीं नांवों तो सागर। तूंही सूर्यवंशींचा किंकर। आम्ही समग्र दास तुझे ॥१२०॥ तुझ्या पित्याचा स्थापित । मी वसत आहें समुद्रांत। तोही अवधारीं वृत्तांत । उपेक्षित जाऊं नको ॥२१॥ पूर्वीं पर्वत पक्षधर । उड्डाणें घेती अति दुर्धर । पुरें पट्टणें करिती चूर । नगरेंनगर भंगिती ॥२२॥ इंद्रें घेवोनियां वज्र । गिरिपक्ष छेदिले समग्र । माझेही छेदावया दुर्धर । वज्रधर[6] चालिला ॥२३॥ मज होतां पलायमान । साह्य जाला तुझा पिता पवन । समुद्रीं आला गा घेवोन । तेणें हा प्राण वांचला ॥२४॥ तुझ्या पित्याचा स्थापित। समुद्रामाजी होतों गुप्त । येतां देखोनि हनुमंत । विश्रांतिहेतू[7] वाढलों ॥२५॥

---

शब्दार्थ : १. घाईने, २. केल्यासारखी होईल, राहील, ३. मधुर, ४. विश्रांतीच्या मिषाने, ५. उल्हासाने, ६. इंद्र, ७. विश्रांती देण्याच्या हेतूने.

हनुमंताचे उत्तर : ऐकोनि मैनाद्रीच्या वृत्तांता। कृपेनें सांगे निजकार्यार्था। शोधावया श्रीरामकांता । अति शीघ्रता मी जातों॥२६॥ आधीं असावी विश्रामता। मग द्यावी विश्रांतता। नामस्मरणें श्रीरघुनाथा । श्रमावस्था मज नाहीं ॥२७॥ ज्यासी नाहीं नामीं विश्वास। त्यासी बाधी श्रम शोक त्रास । श्रीरामाचा निजदास । श्रमाचा लेश मज नाहीं ॥२८॥

तरीही मैनाद्रीचे हनुमंताला विश्रांतीस आमंत्रण : ऐकोनि हनुमंताचें वचन। मैनाद्रीस आलें रुदन। भाग्यें अभागी मी परिपूर्ण। हनुमंतचरण अप्राप्य[1] ॥२९॥ पर्वताचा खेद देखोन। हनुमंत बोलिला वचन। तुझें न घें फळ मूळ जीवन। अंगुलिस्पर्शन[2] तुज न करीं॥१३०॥ पर्वत म्हणे हनुमंता । कृपेनें हात ठेवीं माथां । इतकेन मी सनाथता । आणिक सर्वथा मागेंना ॥३१॥ तंव इंद्र म्हणे मैनाद्री। जालासी हनुमंता साहाकारी। तुज मी सर्वथा न मारीं। समुद्राबाहेरी सुखें विचरें ॥३२॥

मैनाद्री पर्वताच्या मन:शांतीकरिता त्याला अंगुलीचा स्पर्श व त्याचा परिणाम : मग हनुमंतें तये वेळीं । पर्वतीं ठेविली आंगोळी। भारें बैसला समुद्रतळीं। जाला पाताळीं हाहाकार ॥३३॥ पन्नग म्हणती पर्वतावरी । अतिशय भार पडला भारी । करील सप्तपाताळचुरी । नवनागांतरीं हाहाकार॥३४॥ आंगोळी ठेवितांचि शिरीं। पर्वत बुडाला सागरीं । कपि बैसता जरी वरी। तैं होता चकचुरी निर्नाम ॥३५॥ इतुकी करोनि ख्याती । पुढें चालिला मारुती । ब्रह्मादिकां विस्मय चित्तीं। जयजय करिती सुर सिद्ध ॥३६॥ इतुकी करोनि ख्याती । पुढें चालिला मारुती । उल्लंघावया अपांपती[3]। शीघ्रगतीं निघाला॥३७॥ देव दानव अवघे जण। तेंही हनुमंताचा मार्ग रोधून । करावया चालिले विघ्न। तेंही कथन अवधारा ॥३८॥

ततो देवाः सगंधर्वाः सिद्धाश्च ऋषयस्तदा । समब्रुवन्दानवानां मातरं सुरसां दनुम् ॥२०॥
अयं वातात्मजः श्रीमान्प्लवते सागरोपरि । हनूमान्नाम तस्य त्वं मुहूर्तं विघ्नमाचर ॥२१॥
बलमिच्छामहे ज्ञातुं वयं चास्य पराक्रमम् । किं करिष्यत्युपायं वा विषादं वा करिष्यति ॥२२॥

सागरावरी शीघ्र गमन । करिताहे वायुनंदन। राक्षसरूपें करावें विघ्न। गमनागमन खंडावें ॥३९॥ किती बळ आहे हनुमंता । पहावया आवडी देवां समस्तां। दानवाची दनु जे माता । ते विघ्नार्था धाडिली ॥१४०॥ जावों शके निजात्मशक्ती । किंवा येईल काकुळती। काय करील मारुती । तें निश्चितीं आम्ही पाहूं ॥४१॥

हनुमंताच्या सामर्थ्याची परीक्षा पाहाण्यासाठी दनूला पाठविली : दनु सुरसा दानवांची माता। कपटतेजें सतेजता । ऐकोनि देवांचि हे कथा । विघ्न हनुमंता करूं आली ॥४२॥ आश्रयूनि समुद्रजळ । राक्षसी जाहली विकराळ । मुख पसरोनि कराळ[4]। कपि तत्काल गिळों आली ॥४३॥ येणें मार्गें जे जे येती। ते ते माझें भक्ष निश्चितीं । तुज मी गिळीन पुसें युक्ती। रीघ मुखाप्रति वानरा ॥४४॥ सीताशुद्धीसीं जातों लवलाहें । श्रीरामकार्यासी साह्य होयें। विघ्न न करीं वो माये। तुझे पाये वंदितों ॥४५॥ भोजनीं निवारीं क्षुधिता। तो सज्ञान अति मूर्खता । कैंचा राम कैंची सीता । तुज मी आतां भक्षीन ॥४६॥ आपुलें चुकावया मरण। मज सांगसी ब्रह्मज्ञान । क्षुधेनें निमालिया[5] प्राण। सुकृत[6] कोण भोगील ॥४७॥ राक्षसीयें पसरिलें वदन। हनुमान जाला एक योजन। येरीं मुख पसरिलें द्विगुण । दशयोजन कपि जाला ॥४८॥ मुख पसरी योजनें वीस । हनुमंत जाला योजनें तीस। येरी पसरिलें चाळीस । कपि पन्नास होऊं सरला ॥४९॥ शत योजनें पसरी वक्त्र[7]। तंव हनुमंत जाला अंगुष्ठमात्र। मुखीं रिघाला सत्वर ।

शब्दार्थ : १. दुर्लभ, २. बोटाने स्पर्श करणे, ३. समुद्र, ४. भयंकर, ५. नाहीसा झाला असंता, ६. पुण्य, ७. तोंड.

नभीं सुरवर देखती ॥१५०॥ देव म्हणती हनुमंता । सुरसेनें गिळिलें तत्वतां । शुद्धी करणें राहिली सीता । अति मूर्खता आम्हीं केली ॥५१॥ हनुमंतें शीघ्र करितां गमन। आम्हीं कां करविलें विघ्न। आम्हां कोपेल श्रीरघुनंदन । स्वर्गी सुरगण धाकती॥५२॥ हनुमंत रिघे राक्षसीवदनीं । अंतरीं पाहतां कश्यपपत्नी। दानवांची सखी जननी। माता सापत्नी देवांची ॥५३॥ पवन जो कां माझा पिता । त्याची हे सावत्र माता । इच्या करों नये घाता । हृदयीं हनुमंता मानलें ॥५४॥ रामकार्याचे त्वरेंकरीं। येथोनि निघावें बाहेरीं। वानराची युक्ती भारी । देखे कर्णरंध्रीं निर्गम॥५५॥ सुरसा चाटी अवाळें। वानर दांतीं तोंडी नाकळे । मुखीचें मुखीं हरपलें। किंवा गुंतलें दशनांतरी[1]॥५६॥ राक्षसी घेतां वदनधांडोळी । तंव हनुमान निघे कर्णबिळीं। भुभुःकार देतां आतुर्बळी। पिटिशली टाळी सुरवरीं ॥५७॥ हनुमंत विवेकी अति ख्यात। न करोनि सुरसेचा घात। निर्गम देखिला श्रवणांत । विघ्नातीत रामनामें ॥५८॥ विघ्नातीत श्रीरामभक्त। त्यामाजी मुखरण[2] हनुमंत। श्रीरामनाम जे स्मरत। ये यशवंत तिहीं लोकीं ॥५९॥ सुमनीं[3] वर्षती देव । जयजयकार करित सर्व । हनुमंताचे लघुलाघव। अति अपूर्व तिहीं लोकीं॥१६०॥

दनु व हनुमंत संघर्षांत हनुमंताची सुटका व त्याचे पुढे प्रयाण : श्रीरामनाम मुखीं मुद्रा। हृदयीं स्मरण श्रीरामचंद्रा । कैचें विघ्न त्या कपींद्रा । क्षणें समुद्रा लंघील ॥६१॥ न करोनि माझा जीवघात। हनुमंत निजबळें निर्मुक्त। देखोनि सुरसा संतोषत। आशीर्वाद देत हनुमंता ॥६२॥

अब्रवीत्सुरता देवी स्वेन रूपेण वानरम् । अर्थसिद्धयै हरिश्रेष्ठ गच्छ सौम्य यथासुखम् ॥२३॥
संयोजयस्व वैदेहीं राघवेण महात्मनां ॥२४॥

सांडोनि राक्षसी क्रूरता। सुरसा जाली शांत रूपता। अर्थसिद्धि पावसी हनुमंता। श्रीरामसीतासंयोगे ॥६३॥ श्रीरामनामीं तुझी मिठी। यालागीं तूं दाटुगा[4] सृष्टीं । तुझेनि रामसीतेंसी भेटी । रामराज्य सृष्टीं तुझेनि ॥६४॥ सीताशुद्धीची समयसिद्धी । तुझेनि होईल गा त्रिशुद्धी। निमेषें लंघिसील उदधी। तूं सद्बुद्धि कपींद्रा॥६५॥ ऐसें बोलोनि उत्तर। सुरसा वंदिला वानर। येरु निघांला सत्वर । समुद्रपार लंघावया ॥६६॥ सुरसा देवी देवविघ्न[5]। कपीनें जिंकिली न मारून। पुढें सागरीं बळवाहन । केले कंदन तें ऐका ॥६७॥ सकळ ग्रंथाचें माहेर। तें हें श्रीरामचरित्र। पवित्र वक्त्याचें वक्त्र। पवित्र श्रोत्र[6] श्रोतियांचें॥६८॥ स्वामिसेवेसी विकिला प्राण । ब्रह्मज्ञानेचें भूषण । नवविधभक्तींचे जीवन। कपिकथन शिववंद्य ॥६९॥ करितां हनुमंताचें स्मरण । विघ्न तेंचि होय निर्विघ्न। स्मरणें सुलभ ब्रह्मज्ञान । कथा पावन हनुमंतें ॥१७०॥ एकाजनार्दना शरण । कपिप्रतापकथा गहन । पुढें काय केलें कथन। सावधान अवधारा॥१७१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां हनुमंतसमुद्रमध्यगमनं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥ ओंव्या ॥१७१॥ श्लोक ॥२४॥ एवं ॥१९५॥

शब्दार्थ : १.दांतांमध्ये, २. मुख्य, ३. पुष्पांनी, ४. बलवान्, ५. देवांनी केलेले विघ्न, ६. कान.

# अध्याय अठरावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

## हनुमंताचा लंकाप्रवेश

हनुमंताच्या उड्डाणात सिंहिकेचे विघ्न : सुरसा देवविघ्नातें । स्वयें जिणोनि हनुमंते । पुढें लंघोनि समुद्रातें। सिंहिका तेथें ग्रासूं आली ॥१॥

प्लवमानं तु तं दृष्ट्वा सिंहिका नाम राक्षसी। मनसा चिंतयामास प्रवृद्धा कामरूपिणी ॥१॥

इदं हि सुमहत्सत्वं चिरस्य वशमागतम् । इति संचित्य मनसा छायामस्य समाक्षिपत् ॥२॥

गगनीं उडतां हनुमंत। छाया पडती समुद्रांत। सिंहिकेचा मनोरथ। ग्रासावया हनुमंत वाढली ॥२॥ शिववरद सिंहिकेसी । छाया धरितां प्राणी ग्रासी । छायाग्रह नांव तिसी । ते हनुमंतासीं गिळों आली ॥३॥ कपिच्छाया पडतां जळीं । सिंहिका ते छाया गिळी। हनुमंताची गति खुंटली । देहाची वळली मुरकुंडी ॥४॥

छायायां संगृहीतायां चिंतयामास वानरः । किमाक्षिप्तोऽस्मि सहसा निरुद्ध इव पर्वतः ॥३॥

तिर्यगूर्ध्वमधश्चापि वीक्षमाणस्तदा कपिः । छायाग्राहि महावीर्यं तदिदं नात्र संशयः ॥४॥

छाया ग्रासितां सिंहिकेसीं । गति खुंटली हनुमंतासी । तेणें तो जाला कासाविसी । पाहे चौपासीं गजबजिला ॥५॥ स्मरोनियां रघुनाथ । अध[1] ऊर्ध्व[2] हनुमान पाहात । तंव देखिली जळाआंत । अति अद्भुत राक्षसी ॥६॥ छायाग्रहो निजनामता । ते हे राक्षसी तत्वतां । वैरी राहूचिये माता। इच्या घाता मी करीन ॥७॥ समुद्रामाजी हें महाविघ्न। तें मी करीन निर्विघ्न। म्हणोनियां[3] हनुमंतें आपण। साटोप पूर्ण मांडिला॥८॥ सिंहिका पसरोनि मुख। आली हनुमंतासन्मुख । कपि वाढे अधिकाधिक । तिणेंही आत्यंतिक मुख पसरिलें ॥९॥

तिच्या पोटात शिरून तिचे उदरविदारण व नाश : एक जाभाड पाताळीं । दुजें लाविलें नभोमंडळी। हनुमान गिळावया महाबळी। गर्जोनि किंकाळी टाकिली॥१०॥ तिच्या मुखामाजी उडी। हनुमंत घाली लवडसवडीं । दातांतळीं जंव ते रगडी । तंव घाटीबुडीं रिघाला ॥११॥

तस्याः संविवृते वक्त्रे निपपात महाकपिः । अत्राण्यादाय सर्वाणि वेगेनापसृतो मुखात् ॥५॥

हृतजीवा हनुमंता न्यपतल्लवणांभसि ॥६॥

रिघोनि तिच्या उदरांतरी। नखाग्रीं तिचें काळीज चिरी। अंत्रमाळा[4] घेवोनि करीं। निघे बाहेरी वानर ॥१२॥ नाहीं दांतांतळी अडकलें । नाहीं चावितां चाखिलें । नाहीं मेद मांस भक्षिलें। जीवें घेतलें वानरें ॥१३॥ मी म्हणें हें अल्पपशु । तंव हा वानरू अति कर्कशु। भरूं न शकतांचि घासु। जीवनाशु येणें केला॥१४॥ याची धरूं जातां छाया। छाया माया नाशिली काया । उद्धरलें मी कपिराया । तुझे पायाचेनि रजें ॥१५॥ श्रीरामभक्तांचे रजःकण । निःशेष नाशिती जन्ममरण । घातक्या देती ब्रह्म पूर्ण। साधु सज्जन कृपाळु॥१६॥ करावी श्रीरामाची भक्ती । पढावी श्रीरामाची कीर्ती । श्रीरामनामाच्या आवर्तीं[5]। जड मूढ उद्धरती तिहीं लोकीं ॥१७॥ ऐसी देवोनि आरोळी । सिंहिका पडे समुद्रजळीं । स्वर्गीं देवीं पिटिली

शब्दार्थ : १. खाली, २. वर, ३. उद्योग, उपक्रम, ४. आंतड्यांच्या माला, ५. आवृत्तीनी.

टाळी । आतुर्बळी हनुमंत ॥१८॥ राहूपासोनि सुटे चंद्र । तैसा शोभला तो कपींद्र । त्यासी देखोनि स्तवीत इंद्र । ब्रह्मा शंकर देखोनी ॥१९॥

भीममद्य कृतं कर्म महत्सत्वं त्वया हतम् । साधयार्थमभिप्रेतमरिष्टं प्लवतां वर ॥७॥

तस्य त्वेतानि चत्वारि वानरेंद्र तथा तव । धृतिर्मतिबलं दाक्ष्यं स कर्मसु न सीदति ॥८॥

मारुतीचा पराक्रम व चातुर्य : छायाग्रही जीवें मारी । दुष्ट नष्ट कामाचारी । भयानक क्रूर भारी । ते वानरें नखाग्रीं मारिली ॥२०॥ करितां समुद्री उड्डाण । चारी पराक्रम अति गहन । तुवं दाखविली आंगवण[1] । श्रीरामभजननिजनेटीं ॥२१॥ रामनामीं दृढ भक्ती । रामस्मरणीं दृढमती । अति दक्षता रामभक्तीं । श्रीरामशक्ती बळिष्ठ ॥२२॥ तेणें बळें अपांपती । उल्लंघितां केली ख्याती । त्या त्या प्रतापाची किर्ती । स्वर्गीं वर्णिती सुरवर ॥२३॥ प्रथमोड्डाणीं महाबळी । महेंद्र दाटला भूतळीं । सर्प दडपले पर्वततातळीं । नाग पाताळीं हडबडिती ॥२४॥ हे प्रथमोड्डाणाची ख्याती । दुसरी हनुमंताची कीर्ती । मैनाद्रि देतां विश्रांती । न घेचि कपिपति महाबाहु ॥२५॥ विश्रांति न घेवोनि महाबळी । पर्वतीं ठेवितां आंगोळी । भारें बुडाला समुद्रजळीं । बैसला तळीं भारभूत ॥२६॥ तेणें अतळ वितळ सुतळ । रसातळ आणि तळातळ । हडबडिले सप्त पाताळ । भारें प्रबळ गिरी दाटी ॥२७॥ आंगोळी लाविता हनुमंत । भारें कोंदला पर्वत । हा दुजा पवाडा[2] समुद्रात । केला विख्यात वानरें ॥२८॥ उल्लंघितां अपांपती । तिसरी केली महाख्याती । सुरसा केवळ कपटमूर्ती । निजात्मशक्तीं जिंकिली ॥२९॥ सुरसा दनुदानवमाता । छळणें छळितसें समस्ता । छळण न चलेचि हनुमंता । होय निघता पुरुषार्थें ॥३०॥ ऋषि आणि दानवमानवा । सुरसा छळी दळणें देवां । तीमाजी करोनि रिघावा[3] । केला निघावा[4] हनुमंते ॥३१॥ सुरसा हनुमंत गिळिला । परंतु जीवे नाहीं गेला । तिचा घात नाहीं केला । झाडा घेतला कपटाचा ॥३२॥ तिचिया कपटाची करितां झाडी । सुरसा जाली ते बापुडी । पायां लागोनि तातडीं । वंदी आवडीं हनुमंता ॥३३॥ आजीपासोनि आतां । निमाली कपटवार्ता । विजयी होसील हनुमंता । श्रीरघुनाथा कृतकार्या ॥३४॥ करोनि कपटाची झाडी । रामकार्याचिये तांतडीं । हनुमान निघाला आवडीं । घालावया उडी लंकेसी ॥३५॥ तिसरी हनुमंताची ख्याती । अति पावन त्रिजगतीं । देव ब्राह्मण वंदिती । अगाध कीर्ती हनुमंता ॥३६॥ आणिक चौथा पवाडा । हनुमंतें केला गाढा । सिंहिका निर्दाळोनि होडा[5] । निघाला पुढां लंकेसीं ॥३७॥ सिंहिका राक्षसी दुर्धर । हनुमंत गिळिला अति सत्वर । नखें निवटोनि निजजिव्हार । निघे वानर बाहेरी ॥३८॥ छायाग्रहण दुष्ट भारी । जळींची जलचरें संहारी । स्थळचरांतें जीवें मारी । घोंट भरी खेचराचा ॥३९॥ तिचें उघडोनि पोट । समुद्री वाहती केली वाट । चौथी कीर्ती हे उद्भट । केली वरिष्ठ वानरें ॥४०॥ त्रिविध भूतांचें भक्षक । प्राणिमात्रांचें जें दुःख । ऐसी सिंहिका मारोनि देख । तिन्ही लोक सुखी केले ॥४१॥ ऐसी चतुर्विध कीर्ती । करोनि निघाला मारुती । पुढें जे जे केली ख्याती । ते तें ग्रंथीं अवधारा ॥४२॥ सिंहिकेच्या उदराप्रती । विदारण केलें मारुतीं । तेचि त्यासी अति विश्रांती । पुढील ख्याती अवधारा ॥४३॥ सिंहिकाविदारण[6] स्थितीं । विश्रांति पावला मारुती । ते चौगुणीं वाढली शक्ती । लंकेप्रती जावया ॥४४॥

---

शब्दार्थ : १. सामर्थ्य, २. प्रताप. ३. प्रवेश, ४. निघणे, ५. पैजेने, ६. सिंहिकेला चिरून टाकल्या स्थितीत.

पुढे उड्डाण करून पडलंकेस आगमन : करोनि सिंहिकाविदारण । हनुमंते केलें उड्डाण। लंका सांडोनियां जाण। गेला आपण पडलंके ।।४५।। पडलंकाराज्यस्थानीं । क्रौंचा रावणाची भगिनी । घर्घर राक्षसाची पत्नी । राज्यस्थानीं ती मुख्य ।।४६।।

घर्घर राक्षसाची पत्नी व रावणाची बहीण क्रौंचा राणी : रावणइंद्रासीं युद्ध घोर। घर्घर क्रौंचेचा भ्रतार। युद्धीं पडिला महाशूर । राक्षसभार गांजोनी ।।४७।। इंद्रें युद्ध केलें दारुण। राक्षसीं दांतीं धरिलें तृण । युद्धी आक्रंदे रावण । रणकंदन देखोनि।।४८।। रावण धरितां रणांगणीं। पाठिराखा न देखे कोणी। सेनाप्रधान गेले पळोनी। निद्रास्थानीं कुंभकर्ण ।।४९।। युद्धी साह्य जाला घर्घर । युद्ध केलें अति दुर्धर । इंद्रें मारिला हाणोनि वज्र। केला चकचूर हाडांचा ।।५०।। शिववरदाचिये शक्तीं । इंद्रजित पावला गुप्तगती। अतर्क्य अभिचारांची[१] युक्ती। अमरपति धरिला तेणें ।।५१।। इंद्रासी लावोनि गळबंधन[२]। लंके आणिला आपण। इंद्रजित अभिधान[३] । तैंपासून पावला ।।५२।। रावणाच्या निजसाह्यांसी । घर्घर पडिला रणभूमीसीं । तेणें आदरें क्रौंचेसी । दिधली राज्यासीं पडलंका ।।५३।। चवदा सहस्र निशाचरी । ठेविल्या क्रौंचेच्या सेवेवरी । अतिशयेंसी दुर्धरी । निजझुंजारी खेचरा ।।५४।।

क्रौंचा हनुमंत यांचा संघर्ष : ते पडलंकापडिपाडीं[४]। उत्तरस्रोताचिये थडीं। हनुमंताची पडली उडी। अति कडाडीं दुर्धर।।५५।। दुमदुमिलें पडलंकापीठ। दुमदुमिलें लंकात्रिकूट। निकुंबळेंसीं कडकडाट । अति उद्भट ऊठिला ।।५६।। भूकंप[५] लंकेमाझारी । तेणें कांपती नरनारी। सीता आणिली करोनि चोरी। तैंहूनि जगरीं बहु विघ्नें ।।५७।। तेणें नादें पडलंकेसी। बाहेर धांविन्नल्या राक्षसी । तंव देखिलें हनुमंतासी । तिंही चौपासीं वेढिलें।।५८।। हनुमंत बालब्रह्मचारी। पुरुषार्थ न करीच स्त्रियांवरी । तेणें तो बांधोनि खेचरीं[६]। नेला भीतरीं पडलंके ।।५९।। हनुमंत रूप धरी सामान्य । क्रौंचा देखे दीनवदन । लाविलें देखोनि गळबंधन । वानर कोण कोणाचें ।।६०।। तिसीं सांगती खेचरी । दणका उठिला उड्डाणेंकरीं । ते हा आणिला भक्ष झडकरीं । फळाहारीं तुम्हांसी ।।६१।। करावया कपीचा घात । क्रौंचा शस्त्रासी घाली हात । तें देखोनि हनुमंत हांसत । माझा भक्षार्थ तुम्ही नेणां।।६२।। जडत्वे मांस नाहीं भीतरीं। म्हणोनि उडों झाडावरी । निष्काळजी निजशरीरीं । गिरीकंदरीं तेणें वसों ।।६३।। रुधिरपूर्ण देहस्थिती । भेद करितां जिरेल क्षितीं[७] । मग काय खाशील वो माती । ऐसी युक्ती न करावी ।।६४।। मांस नाहीं मजभीतरीं । मरणभय नाही शरीरीं। देह लावावा परोपकारीं। सगळ्याचें करी भक्षण ।।६५।। मज सगळें गिळिल्यावरी । चवी चाखिसी तोंडावरी । माझे निजपुष्टीची थोरी । क्षणामाझारी पावसी ।।६६।। ऐकोनि हनुमंताची युक्ती । क्रौंचा सत्य मानी चित्तीं । सवेंचि गिळावया मारुती । वदनावृत्ती पसरली ।।६७।। तिणें पसरितोंची जाभाडी । हनुमंत सवेग घाली उडी । आकळितां जिव्हालडबडी। तंव घाटीबुडी रिघाला ।।६८।। न कळेचि जिव्हामूळीं । नाडळेचि दांतांतळीं। वदन वाफु जाली होळी। चाटी अवाळी[८] राक्षसी ।।६९।। आंबट तिखट ना खारट। गोड अथवा तें तुरट। चवी न कळें पैं स्पष्ट। करी कटकट राक्षसी ।।७०।। ऐसी सांगतां निजगोष्टी । कपि काळीज धरी मुष्टीं । तंव तियेसीं शूळ उठे पोटीं। लोळे सृष्टीं गडबडां ।।७१।। काळिज धरोनी मुष्टीसीं। वानर पाहे विस्मयेंसीं। बांधावया

शब्दार्थ : १. जारणमारणादि विद्येची, २. गळफांस, ३. नांव, ४. पडलंकेच्या जवळ, ५. धरणीकंप, ६. आकाशमार्गी गति असणाऱ्या राक्षसिणींनी ७. पृथ्वीमध्ये, ८. ओठ.

कोटिकुंजरांसी। देखे दोहीं कुशीं बहुवाडी ॥७२॥ जठराग्नीमाजि जाणा। पडिले पर्वत होती चुना । असो हे तिची विचारणा । कपिकथना अवधारा ॥७३॥

तिचें काळीज बाहेर काढून तिच्या पोटात पुच्छ खुपसून तिचा नाश : काळिज धरितांचि रोकडें । क्रौंचां लोळे गडबडें । सगळें गिळोनि केलें कुडें । अति वाबडें वानर ॥७४॥ वानर नाढळेचि दांतीं। परी जावोनि तें बैसलें पित्तीं । ओखद खावयाची उपपत्ती । केली आइती[१] ते ऐका ॥७५॥ निंबाचीं शतानुशत झाडें । खसखसां रगडितसे दाढें । चुळोदकीं हनुमंत बुडे। तेणें तो उडे उदरांत ॥७६॥ उदरीं वानर उडतां । क्रौंचा पावे परम व्यथा । तिच्या करावया निजघाता । बुद्धि हनुमंता आठवली ॥७७॥ पुच्छ वाढवोनि वानरें । कंठीं सूदलीं[२] पुच्छाग्रें। तेणें ते खोकोनि गजरें । मग ओकारी सूटली ॥७८॥ पुढें देतां ओकारें । मागे अधोवात सरे। गांजूं आदरिलें वानरें। हागी ओकारें लागलें ॥७९॥ अधोवाताचे गजरीं । उडविल्या निशाचरी । त्या परिभ्रमोनि[३] अंबरीं[४] । पडोनि सागरीं बुडाल्या ॥८०॥ आइजीचे अतिश्रद्धें[५]। दुर्गंधे निर्बुजलीं[६] घ्राणें। राक्षसी धाकती[७] निजप्राणें । मागें राहणें धड नव्हे ॥८१॥ दीर्घ देतां पैं ओकारी। पुच्छ आलें मुखाभीतरी। क्रौंचा धरोनियां करीं । ओढी बाहेरी अति कष्टें ॥८२॥ ओढा ओढा गे झडकरीं। ओढिती दहा वीस नारी। तंव तें ओढेना तिळभरी। शतसहस्त्रीं ओढितां ॥८३॥ चवदा सहस्र राक्षसी श्रेष्ठ । ओढिताती अति उद्भट। तरी पुच्छाचा नव्हे शेवट। फुगलें पोट क्रौंचेंचें ॥८४॥ पहिलें सामान्य दिसे वानर । उदरीं वाढलें अति थोर । न लभे पुच्छाचा परपार । येर शरीर कोण जाणें ॥८५॥ आइजींचे भाग्य थोर । वमनें उन्मळलें वानर । येरवीं करितें हें संहार । ओढा समग्र समयोगें ॥८६॥ चवदा सहस्र निशाचरी। पुच्छ ओढिती बळें भारी। काळीज घेवोनियां करीं । निघे बाहरी हनुमंत ॥८७॥ काळीज उपडितां समूळीं । क्रौंचेनें दिधली आरोळी । आदळलिया भूतळीं । प्राण तत्काळीं सांडिला ॥८८॥ क्रौंचेचें गजरें भारी। निधा[८] उठिला गिरिकंदरीं । तेणें निकुंबळ थरारी । लंकेमाझारी भूकंप ॥८९॥ चवदा सहस्र निशाचरी। आकळोनि पुच्छेंकरीं। झुगारिल्या पैं सागरीं। नेल्या जळचरीं भक्षार्थ ॥९०॥

पडलंकेच्या उड्डाणाला कालिका खंडाचा आधार : हनुमंताचें पडलंके उड्डाण। हें काळिकाखंडींचें निरूपण। श्रोतीं पाहोनि सावधान। वृथा भाषण न म्हणावें ॥९१॥ हे तंव रामायणी कथा । जरी मी बोलिलो वृथा । तरी तारक तत्वतां । याहीवरी श्रोतां क्षमा कीजे ॥९२॥

सर्व नगरीच्या नाशातून एक वृद्धा जिवंत राहिली : पडलंकेच्या माझारीं। एक उरली वृद्धा नारी। येर मारिल्या समग्री । केली ञोहरी[९] हनुमंतें ॥९३॥ वृद्धेकडे हनुमंत। कृपादृष्टीं अवलोकित। पुसेन तो सांगे वृत्तांत। नाहीं तरी घात मी करीन ॥९४॥

तिच्याकडून माहिति घेऊन हनुमंताचे लंकेकडे गमन : येथोनियां पुढारीं । लंका आहे किती दुरी। येरी म्हणे राहिली माघारी। पाहों पां हारी कळसांच्या ॥९५॥ परतोनि पाहे लंकापुरी। रावणमंदिराची थोरी। कनककळसांचिया हारी। माडिया गोपुरी रत्नांक ॥९६॥ कैसे शोभती रत्न कळस। तेजें लोपविती तरणीस[१०]। लंका देखोनि सावकाश । अति उल्लास हनुमंता

शब्दार्थ : १. युक्ती, २. घातली, ३. भोवून, ४. आकाशात, ५. मलद्वारशब्दाने, ६. कंटाळली, ७. भ्याल्या, ८. प्रतिशब्द. ९. नाश, १०. सूर्याला.

॥९७॥ शोधावया श्रीरामकांता । घरधांडोळी घेईन आतां। जाजावोनि[1] लंकानाथा। करीन घाता राक्षसांचे ॥९८॥ मर्दोनि इंद्रजिताचा प्राण । त्यासीं करीन रणकंदन । रणीं मारीन राक्षसगण। सीतारत्न शोधावया॥९९॥ ऐकोनि राक्षसीचें वचन । मागें देखोनि लंकाभुवन। करोनि उफराटे किराण[2] । आला आपण लंकेसी ॥१००॥

रावणाचा विजयध्वज उपटून लंकेत फेकला : रावणाचा विजयकेत। त्याचा पुच्छें केला घात। संमुख पाडिला लंकेआंत। तेणें आकांत राक्षसां॥१॥ सहित शिखरें विजयकेत । पडिला देखे लंकेआंत । तेणें दचकला लंकानाथ। आला अनर्थ लंकेसीं ॥२॥ नाहीं वायूचा झडाडा । नाहीं मेघांचा गडाडा । शिखरें खचलीं कडाडां। भंगिला दृढ विजयकेतु ॥३॥ रावणें हरिली श्रीरामरमा । तेथूनि विजयो नाहीं आम्हां। राजा रातला[3] अधर्मा। मरणधर्मा पावेल॥४॥ ऐकोनि जनांचिया गोष्टी। उल्लास हनुमंताच्या पोटीं । पुच्छी बांधोनि शकुनगांठी। राक्षसकोटी मारावया॥५॥ शोधावया सीतारत्न । स्वरूप धरी आनें[4] आन[4]। केसें कैसें करील चिन्ह । सावधान अवधारा ॥६॥

ससागरं दानवपन्नगायुतं बलेन विक्रम्य महोर्मिमालिनम् ।
निपत्य तीरि च महोदधेस्तदा । ददर्श लंकाममरावतीमिव ॥९॥

अति दुर्धर हनुमंत वीर । वाढलासे पर्वताकार । शोधावया सीता सुंदर। करी विचार निजमानसीं॥७॥ साधावया रामकार्यार्था। स्थूळ रूपें न लभे सीता । शुद्धि न लभेचि तत्वतां । तरी कां वृथा कष्टावें॥८॥ ऐसा करोनि विचार । जाला सामान्य वानर। कोठें गोचर[5] कोठें अगोचर । सीतार्थ नगर शोधावया॥९॥ माझा आत्मा श्रीरामचंद्र । हा हनुमंतीं निजनिर्धार। तेणें जाणोनि विघ्नसंभार[6]। हेला[7] समुद्र लंघिला ॥११०॥ भंगोनि रावणविजयकेत । आला केतकीवनाआंत । सीता शोधावया हनुमंत । करी आकांत लंकेसीं ॥११॥ करोनि पडलंकेची झाडी । आतां लंकेसीं आली धाडी। मारोनि राक्षसांच्या कोडी । सीता धडफुडी शोधीन ॥१२॥ सीतेचिया शुद्धीसांठीं । पुरवीन इंद्रजिताची पाठी। मारोनि राक्षसांच्या थाटी[8] । सीता गोरटी शोधीन ॥१३॥ करितां सीतेच्या शुद्धीसी। रावणा गांजीन सभेसीं। क्षोभवोनि निजपुच्छासी । लंका चौपासीं जाळीन॥१४॥ ऐसा हनुमंताचा आवांका। समूळ शोधावया लंका । जें जें विंदान[9] करीन देखा। तें तें ऐका चरित्र ॥१५॥ रावणाच्या उपऱ्यांवरी[10] । नारिकेळींचिया हारी । हनुमंत सामान्य रूप धरी । चढला त्यांवरी अति गुप्त ॥१६॥ तेथोनि पाहे लंकापुरी। जैसी अलकावती नगरी । ना[11] ते अमरावती दुसरी । त्यांहूनि थोरी लंकेची ॥१७॥ त्रैलोक्यींचे वैभव । लंकेसीं आणिलें असे सर्व । अमरपुरीहूनि अपूर्व। दिसे गौरव लंकेचें॥१८॥ ख्याति करोनि समुद्रांत । लंके आला हनुमंत। किष्किंधाकांडाचा अर्थ । जाला समाप्त श्रीरामें ॥१९॥ व्यर्थ वानिलें हनुमंता । जिव्हा झडे ऐसें म्हणतां। श्रीरामबळें तो सपुरता[12]। आणि पढियंता श्रीरामाचा ॥१२०॥ सीताशुद्धीचें कैवाड[13] । सुंदरकांड अति गोड । हनुमंत ख्याति करील अति दृढ । सुखसुरवाड[14] श्रोतियांसी ॥२१॥ हनुमंताच्या बळबंडा । बाणपिसारा लावील भवंडा । तेणें श्रीरामभजनीं होवोनि गाढा ।

शब्दार्थ : १. छळून, २. उड्डाण, ३. रमला, ४. निरनिराळे, ५. दृश्य, ६. विघ्नसमूह, ७. लीलेने, ८. समुदाय, ९. युक्ती, १०. उपरमाड्यावर, ११. किंवा. १२. पूर्ण, १३. कैवार, १४. सुखाधक्य.

किष्किंधाकांडा। संपविलें ॥२२॥ सुग्रीवाच्या दुःखदुर्वाडा[१] । छेदोनियां सप्त ताडां । ठेंचोनि वाळीचिया तोंडा । किष्किंधाकांडा संपविलें ॥२३॥ सुग्रीवें सीताशुद्धीच्या कैवाडा । वानर धाडिले चहूंकडा । हनुमंतें अर्थ साधोनि गाढा । किष्किंधाकांडा संपविलें ॥२४॥ सीताशुद्धीचेनि केवाडा । वानरां मरण आलें रोकडां । संपाती सीता दावूनि पुढां । किष्किंधाकांडा संपविलें ॥२५॥ सीताशुद्धीचिया चाडा । घेवोनि हेमा तापसीचा झाडा । समुद्र लंघोनि रोकडां । किष्किंधाकांडा संपविले ॥२६॥ समुद्र लंघावया पुढां । वानर पडिले सांकडां । हनुमान कैवारी धडफुडा । किष्किंधाकंडा संपविलें ॥२७॥ संपविलें किष्किंधाकांड। पुढें सुंदरकांड अति गोड । पुरे श्रोतयांचे कोड । सरे चाड वक्त्याची ॥२८॥ एकाजनार्दना रण । कथाकौतुक रामायण । श्रोतीं दिधलें अवधान । ब्रह्म समाधान श्रवणार्थे ॥२९॥ कथा ऐकतां सादर । निरसोनियां क्षराक्षर[२] । श्रीराम पाविजे चिन्मात्र । कथा पवित्र रामायणी ॥१३०॥ रामकथेचें अक्षर। क्षराक्षरातीत पर । अवघी कथा सन्मत्र । चिदचिन्मात्र[३] रामायण ॥३१॥ एकाजनार्दना शरण । किष्किंधाकांड जालें संपूर्ण । पुढें गोड निरूपण । सावधान अवधारा ॥३२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे किष्किंधाकांडे एकाकारटीकायां हनुमंतलंकाप्रवेशो नाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥ ओंव्या ॥१३२॥ श्लोक ॥९॥ एवं ॥१४१॥

*॥ श्रीराम जय राम जय जय राम ॥*

*किष्किंधाकांडं समाप्तम्*

शब्दार्थ : १. दुःखातिशयामुळे, २. क्षर म्हणजे विनाशी, आणि अक्षर म्हणजे अविनाशी, ३. चेतनाचेतनात्मक.

श्रीसद्‌गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## सुंदरकांड

चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् ।
एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥

### अध्याय पहिला

॥ श्री सीतारामाभ्यां नमः ॥
॥ श्री गुरुदत्तात्रेयाय नमः ॥
॥ श्रीराम समर्थ ॥

#### लंकेचा शोध

रामं लक्ष्मणपूर्वजं रघुवरं सीतापतिं सुंदरम् । काकुत्स्थं करुणार्णवं गुणानिधिं विप्रप्रियं धार्मिकम् । राजेंद्रं सत्यसंधं दशरथतनयं श्यामलं शांतमूर्तिम् । वंदे लोकाभिरामं रघुकुलतिलकं राघवं रावणारिम् ॥१॥

श्रीरामनामाचा महिमा : श्रीरामें पावन[1] कथा। श्रीरामें पावन वक्ता। श्रीरामें पावन श्रोता[2]। श्रीराम स्वतां ग्रंथार्थ ॥१॥ श्रीरामें धन्य धरणी[3] । श्रीरामे धन्य करणीं । श्रीरामें धन्य वाणी। जे रामायणीं विनटली[4] ॥२॥ श्रीरामें पावन संसार। श्रीरामें पावन चराचर । श्रीरामें पावन नर । जें तत्पर नित्य स्मरती ॥३॥ रामनामें शुद्ध साधन। रामनाम शुद्ध ज्ञान। रामनामें सुटे बंधन । नाम पावन सर्वार्थी ॥४॥ रामनामें सरतें[5] तोंड । रामनामें सरलें किष्किंधाकांड। आतां उगवलें सुंदरकांड । अति प्रचंड प्रतापी ॥५॥ पहा रामनामाची थोरी। श्रीराम पाहे सर्वांतरी । रामनाम सत्वर उच्चारी । तेणें भवसागरीं तरतील ॥६॥

शब्दार्थ : १. पवित्र, २. ऐकणारा, ३. पृथ्वी, ४. रंगली, ५. मान्य.

लंकेच्या उच्च भागावर बसून मारुती पुढील बेत करतो : सुंदरकांडींचीं कथावृत्ती[१]। आदि मध्य आणि प्रांतीं[२]। हनुमंताची परम ख्याती। सीताशुद्ध्यर्थीं प्रताप ॥७॥ त्याच्या प्रतापाची थोरी। राहोनि लंकेच्या शिखरीं। शोधावया सीता सुंदरी। विचार करी तो ऐका ॥८॥ त्रिकूटाच्या शिखरावरी। हनुमान वेंधोनियां[३] पाहे चौफेरीं। तंव देखे कनककळसांचिया हारी। गगनोदरी लखलखती ॥९॥ जैसीं नक्षत्रें नभाच्या पोटीं। सुप्रभा शोभती गोमटी। कनक कळस लखलखिती त्रिकूटीं। कोट्यनुकोटी लंकेमध्ये ॥१०॥

लंकावर्णन व तिचें अभंगत्व: द्यावी अमरावतीची उपमा। त्याहूनि अधिक इची महिमा। लंका निर्माण करी ब्रह्मा। विश्वकर्मा प्रेरूनी[४] ॥ ११॥ कुबेराची अलकावती। रावणें हिरोनि घेतां वस्ती। त्यासी शंकूनीऽ उमापती[५]। अलकावती सोडविली ॥१२॥ ते काळीं विश्वकर्म्याचे हातीं। लंका करवी प्रजापती। दुर्गे[६] दुर्गम अति निगुती। अगम्य गति सुरासुरां ॥१३॥ अमरावती अलकावति। अवलोकूनियां भोगावती। देखोनि अधिक लंकेची स्थिती। संतोषें वस्ती रावणें केली।॥१४॥ पाहतां कैलासासमान। शोभे लंकेचें महिमान। दुर्धर[७] राक्षसांसहित जाण। दशानन संरक्षी ॥१५॥ उत्तम मध्यम नरीं। शुद्ध अशुद्ध नरनारीं। नांदिजे कनकाच्या मंदिरीं। लंकेची थोरी अनुपम्य ॥१६॥ अगाध लंकेचें महिमान। स्वयें संरक्षी रावण। कोट्यनुकोटी राक्षसगण। परिभ्रमण सदा करिती ॥१७॥ तेथें रिघावया जाण। संधि न लभे अणुप्रमाण। लंकादुर्ग अति दारुण। केंवी आपण रिघावें ॥१८॥ लंकादुर्गी रिघोनि वारा। स्वयें जाऊं न शके सैरा। त्यासही रावणाचा दरारा[८]। केला कामारा[९] केरकाढ्या ॥१९॥ जेथें पुंजेंनीं[१०] गदळली[११] वाट। तेथें वायूसीं वाजती साट[१२]। त्या लंकेमाजी मी मर्कट। कैसेनि परिस्पष्ट[१३] वागावें॥२०॥ वानररूपें लंकेआंत। हिंडतां होईल अनर्थ। कौतुकें जो तो धरील येथ। रामकार्यार्थ नासलें ॥२१॥

वानरूप किंवा राक्षसरूप घेऊन कार्य पार पाडणे कठिण: राक्षसरूप धरितां क्रूर। तेथेंही अनर्थ आहे थोर। ब्राह्मणमांसाचा आहार। निशाचर करविती ॥२२॥ राक्षसजातीचा परीक्षी। द्विजमांस स्वेच्छा भक्षी। तो राक्षस शुद्धपक्षी। येरु विपक्षी[१४] मारिती ॥२३॥ द्विजमास मज भक्षितां। समुद्रलंघन होईल वृथा। कैंचा राम कैंची सीता। अध:पाता मी जाईन ॥२४॥ राक्षसरूपाचा विटाळ। मज न व्हावा अळुमाळ। कांटाळोनि गोळांगुळ। विचार स्थूळ मांडिला ॥२५॥ मग स्मरोनि रामनाम। हनुमंत पावला विश्राम। लंकाप्रवेश अति दुर्गम। नीतिधर्म उपपादी ॥२६॥ करूं जातां स्वयें शिष्टाई। गर्वे रावण न मानील पाहीं। सीता सुटेसें दान नाहीं। दानें वैदेही सुटेना ॥२७॥ राक्षसांसी करितां भेद। न घडे आप्तत्वाचा बोध। मांसभक्षणीं संबंध। आप्तवाद तेथें कैंचा ॥२८॥ भेदूं जातां राक्षसांसी। भेद जाईल दशग्रीवासीं। भेद न चले तयासीं। युद्धहि त्यापासीं दुस्तर[१५] ॥२९॥ लंकादुर्ग अति दुर्धर। इंद्रजित कुंभकर्ण जुंझार। भोंवता आहे हा सागर। नरवानर केंवी येती ॥३०॥ श्रीराम निधडा जुंझार। रावण छेदील सपरिवार। आडवा सागर दुस्तर। तो लंकापुर केंवी पावे ॥३१॥ नीतिशास्त्राचा अवबोध। साम दाम भेद युद्ध। रावणीं न चले संबंध। नीतिविरुद्ध राक्षस ॥३२॥ बैसोनी लंकेच्या शिखरीं। नानापरी विचार करी। लंकादुर्ग अटक भारी। कोणीपरी शोधावें ॥३३॥ असो हा लंकेचा वृत्तांत। मज साह्य श्रीरघुनाथ। लंका शोधीन समस्त। सीताशुद्ध्यर्थ निजांगें ॥३४ ॥

वंचनीया मया सर्वे जानकीपरिमार्गत:। लक्षालक्षात्मरूपेण द्रक्ष्यामि जनकात्मजाम् ॥२॥

---

शब्दार्थ : १. कथेचा क्रम, २. शेवटी, ३. चढून, ४. ताठवून, ५. शंकर, ६. किल्ले, ७. भयंकर, ८. भीती, ९. चाकर, १०. कचऱ्याच्या ढिगांनी, ११. मलिन झाली, १२. चाबूक, १३. उघड उघड, १४. अन्यपक्षीय, शत्रू, १५. उपदेश.

इति संचिंत्य हनुमान्वैदेह्या दर्शनं तदा । पृषदंशमात्र: स कपिर्बभूवाद्‌भुतदर्शन: ॥३॥

म्हणून अत्यंत सूक्ष्म रूपाने लंकेत प्रवेश : लक्षालक्ष स्वरूपविधी। ठकोनी राक्षसांच्या बुद्धी । मी करीन सीताशुद्धी । कार्यसिद्धी श्रीरामें ॥३५॥ सुरां असुरां निशाचरां[१]। अलक्षगतीमज वानरां । घरधांडोळी घेऊनी नगरा । सीता सुंदरा पाहीन ॥३६॥ ऐसा करोनियां विचार। हनुमंत जाला मशकमात्र । ऐसें धरूनि शरीर । अति लघुतर कपि जाला ॥३७॥ मुंगीचिया नयनाआंत । खुपों नेणेचि हनुमंत । येणें रूपें लंकेआंत । प्रवेशोनि पहात रमाकांता ॥३८॥ कोणा न कळतां मात । जगाचें न दुखवितां चित्त । हनुमंत निघे लंकेआंत। असे पहात रामप्रिया॥३९॥ खंदकपाळीं[२] अति आटाळीं[३]। उपरियाउपरीं माळयामाळीं। दुर्गींचिया पौळीमौळीं[४] । जनकबाळीं पहातसे ॥४०॥ वनें उपवनें काननें । देवालयें शिवस्थानें । मठ मठिका ध्यानभुवनें। सीतेकारणें शोधित॥४१॥ कडे कपाटे स्रोत कांतारें। पर्वत गुहा गिरिकंदरें। सूक्ष्म स्थानें अनेक विवरें। साक्षेपें वानरें शोधिली॥४२॥ आराम विराम उपरम । समविषम विषमीं सम। आश्रमाचे आश्रमधाम। प्लवंगम[५] स्वयें शोधी ॥४३॥ नाना वाटिका[६] उदंड। शैलकक्षें[७] पैं वितंड। सरोवरस्थानें प्रचंड। शोधी सुदृढ हनुमंत ॥४४॥ चूतखंडे अच्युतखंडें । कुशमर्दमपाणिपाखंडें । डावलोनि[८] बंडें उदंडें । मध्यमादंडें सीता पाहे ॥४५॥ ऐसा शोधूनी[९] बाह्यप्रांत। मग निघाला नगराआंत । सीता शोधावया हनुमंत । अति उदित साक्षेपें॥४६॥ तत्वें निरसूनी समस्त । साधक आत्मासाधी निश्चित । तेंवी घरोघर धांडोळित। असे पाहत वैदेही ॥४७॥

ब्रह्मराक्षसांची वसती, शैवदीक्षा, त्रिपुंडधारी वगैरे विविध जाती : पाहतां लंकेमाझारी । ब्रह्मराक्षस वसती नगरीं। त्यांच्या निवासाची थोरी। निजनिर्धारीं अवधारा॥४८॥ एक राक्षस लंकेमाझारी। रुद्राक्षमाळा गळां शिरीं । शैवदीक्षाधारी । त्रिपुंडधारी मंत्रोक्त ॥४९॥ दान अन्न देऊनि भूतांसी। काषायवस्त्रें[१०] एक संन्यासी। दृष्टी देखिल्या मनुष्यासी । साक्षेपेंसीं गिळिती ॥५०॥ सर्वेंचि करिती आचमन । स्वाहा करिती होमहवन । कर्मे दाविती विचक्षण। धरिती ध्यान आहारार्थ ॥५१॥ एक नागवे जटाधारी । भस्मधारी शरीरीं। रिघोनियां वनांतरीं । गायी मारिती भक्षणार्थ ॥५२॥ तेंचि गोचर्म धरूनि करीं । आम्हीं गोजिनांबरधारी । ऐसें मिरविती लोकाचारीं। वेषधारी राक्षस ॥५३॥ मांस भक्षावयाचा स्वार्थ । ऐसी संपादिती मात । ऐसे राक्षस लंकेआंत। देखें हनुमंत विचरतां ॥५४॥ मांस भक्षितां स्वइच्छेंसीं। वांटा न देती कोणासी । संन्याशाचें घेतां तुम्हांसीं । नरकवासी पैं व्हाल ॥५५॥ अग्निहोत्री राक्षस तेथ । कुंड मंडप वेदिकायुक्त। दोन्ही कर कुशमंडित। सायंप्रात: होम देती॥५६॥ मुष्टि मुष्टि कुश करीं । देखिल्या मनुष्या तेणेंचि मारी । मांस भक्षावया होम करी । पापाचारी राक्षस ॥५७॥ होत्या पोत्याचा पुरोडाश[११] । त्याचाहि स्वयें करिती ग्रास । वाटा न देती कोणास। अति कर्कश मांसार्थी ॥५८॥ जेथें जेथें अति गौल्यता[१२]। तेथें कैंचा राम कैंची सीता। तेथोनी निघतां हनुमंता । होय देखता आश्चर्य ॥५९॥ वेदपाठक लंकेआंत। विजनीं आरण्यकें पढत । मनुष्य देखिल्या तेथ । स्वयें भक्षित फळाहारा ॥६०॥

अग्निहोत्राश्च वेदाश्च राक्षसानां गृहे गृहे । यदा सत्यं च शौचं च राक्षसानां न विद्यते ॥४॥

अग्निहोत्री, क्षत्रिय इत्यादिंची घरे शोधिली : अग्निहोत्र वेदाध्ययन। राक्षसांघरीं संपूर्ण । दया सत्य शुचित्वपण । राक्षसां जाण असेना॥६१॥ ऐसी शोधितां ब्रह्मपुरी। ब्राह्मण गोंविले दोरीं। कर्माभिमान त्यावरी शिरीं । सीता सुंदरीं तेथें नाहीं ॥६२॥ सर्वां भूतीं असे भगवंत।

---

शब्दार्थ : १. राक्षसांना, २. खंदकांच्या जागेत, ३. गच्च्यांवर, ४. तटांवर, ५. वानर, ६. बागा, ७. पर्वतांचे कडे, ८. टाकून, ९. मध्यम स्थितीने, १०. भगवी वस्त्रे स्वीकारून, ११. यज्ञद्रव्याचा शेष, १२. दांभिकपणा.

ऐसी दया नाहीं तेथ। कैंचा राम कैंची सीता तेथ। मुद्रा मंत्र ते दीक्षा ॥६३॥ पाहतां क्षत्रियांच्या थाटा। वाढिवेचा[1] गर्व ताठा। लागता हनुमंताचा चपेटा। स्वयें पटापटां पडतील ॥६४॥ नाहीं वीरवृत्ती पुरी। मरणभयाची न फिटे शिरी। ऐसें भेड क्षत्रियां घरीं। सीता सुंदरी न भेटे ॥६५॥ मरणभय पोटाआंत। ते तंव क्षत्रिय अति अशक्त। तयांसी नपुंसक म्हणत। सीता निश्चित तेथें नाहीं ॥६६॥ ऐसें शोधितां क्षत्रियापुरीं। तेथें न लभे सीता सुंदरी। मग निघाला वैश्यांचे घरीं। श्रीरामनारी शोधावया ॥६७॥ वैश्यांचे उदिमीं चित्त। अति लोलुप वांच्छिती वित्त। शीघ्र प्रवेशोनी पहात। सीताशुद्ध्यर्थ न लभेचि ॥६८॥ वैश्यांचे कृपण मन। कवडी कवडी सांचविती धन। त्यांचे घरीं सीता निधान। न लभे जाण हनुमंता ॥६९॥ आतां शोधूं शूद्रजातीं। तीमाजी अठरा पगड जाती। तीं घरें धुंडाळित मारुती। सीता सतीशुद्ध्यर्थ ॥७०॥ पाहतां साळियांच्या मागीं। अवघीं गारींत घातली गुडघीं। हनुमान निजपुच्छाच्या संयोगीं। जाळील आगीं सस्नेह ॥७१॥ चाटे[2] असत्यवादी ऐका। अंगळु मंगळु बोलती देखा। हनुमंत जाणे आगळिका। लावील सीका[3] पुरदहनीं ॥७२॥ ऐसी शोधिता चाटेवोळीं। तेथें न लभे जनकबाळी। पहावया सोवन्यांची आळी। निघाला आर्तुबळी हनुमंत ॥७३॥ सोवन्याचें[4] कर्म खोटें। खार लाविती नेटपाटें। बाहेर मुदियांचे साटे। शिस कांटे भांडवल ॥७४॥ रूपलग लाविजे एकीं। शीसलग लाविजे आणिकीं। पाहतां अवघेही हीन तुकीं। तेथें जानकी दिसेना ॥७५॥ सोनारांचा परिपाक। अवघे करिती ठकठक। देहाचा चोर एक एक। नाडिती लोक विश्वासें ॥७६॥ कडींलग मोतींलग। दाविती झळकेंचि झगमग। परी तें अवघे करिती डांकलग। नगें नग हीणकस ॥७७॥ सोनारकामाचा विवेकू। समूळीं विश्वासघातकू। लटिकीं तुकें[5] देती तुकतुकूं। घेती जोखजोखूं दों हातीं ॥७८॥ सांगोनि विश्वासाच्या गोष्टी। खार लाविती पाठीं पोटीं। घालोनि सलोभाच्या पुटीं। पाडिती तुटी मुदलेंसीं ॥७९॥ साडेपंधरा[6] घेऊनि हातीं। देता नागवले किती। सोनारकामाची हे ख्याती। सीता सती तेथें नाहीं ॥८०॥ कांसारकामाचें कौतुक। एक एक तें नाळिक[7]। अवघे काळेंचि देख। तुळा तुक तुटले ॥८१॥ कासार कामाचे परिपाटीं। अवघीं जनी केलीं बुटी। तेथें कैंची सीता गोरटी। निघे उठाउठीं हनुमंत ॥८२॥

व्यवहारी : व्यवहारियांची ऐसी दशा। कळांतराची[8] बहु आशा। मुदला घालूनि फांसा। लाविती आशा अति लोभें ॥८३॥ लक्ष्मी देऊनि पुढिला हातीं। काळा कागद लिहूनि घेती। तेणेंचि काळमुखे होती। खती करति जीवासीं ॥८४॥ देहींच्या खता देहींच व्यथा। त्याहूनि थोर कागदाच्या खता। त्याची व्यथा जीवाचे माथां। तिन्ही अवस्था अति दुःखी ॥८५॥ खत फाडिलें खताखती। जो भेटें त्यास साक्षी करिती। स्वप्नीं व्यवहार सांगती। ओसणती[9] निजेलिया ॥८६॥ देखोनि स्वतांची संपत्ती। व्यवहारी सव्यें उल्लासती। मागों गेलिया न लगे हातीं। मग कुंथती अति दुःखें ॥८७॥ व्यवहारियांची ऐसी गती। धरण्या करितां न लभे भुक्ती। धनलोभ्या कैंची मुक्ती। सीता सती तेथें नाहीं ॥८८॥

तेली-साळी : पाहतां तेलियाचें घर। नित्य करिती करकर। अवघे म्हणती पहारोपहार[10]। भेटा रामचंद्र उठलिया ॥८९॥ जैहूनि[11]आणिली जनकबाळा। तैंहूनि गेली लंकेची कळा। हनुमंतें धिक्कारिलें सकळां। होईल तळमळा पुरदाहें ॥९०॥ तेलियाची निजजाती। नित्य नवे फेरे खाती। तेथें कैंची सीता सती। निघे मारुती पुढारां ॥९१॥ मुळींचा तंतु तुटतां सांग। साळी[12] विसरले मागेंमाग। पांजणीपरवणीचा उद्वेग। अति लगबग खळीलागीं ॥९२॥

शब्दार्थ : १. शौर्याचा, २. कापडवाले, ३. शिक्षा, ४. सोनारांची, ५. वजने, ६. सोने, ७. जुने, फुटके, ८. व्याजाची, ९. बडबडती. १०. प्रत्येक प्रहरास, ११. जेव्हापासून, १२. कोष्टी, विणकर.

खांचे रिघाले जीवें जीत । घडिया घडी न सांधे तेथ । सरूप नुतरेचि सवसुत[१] मग तणतणीत ताणोनि ॥९३॥ अहर्निशीं थोटें हाणितां । स्वरूप नुतरेचि सर्वथा । साऊट बारूट गेले वृथा । तेथें सीता न लभेचि ॥९४॥

तांबोळी : तांबोळीसन्मान पानभरें। देंठझडी झाले एकसरें। म्हणती फेरारे फेरारे । अभ्यंतरें मुरकुटले ॥९५॥ रुसण्या फुगण्याचें कारण। पानापाशीं अति सन्मान । तेणें अंतरीं सडलीं जाण । पडिलें खान निजलोभा ॥९६॥ पानसन्मानें अति दाटुकी। झडली अभिमानाची आटुकी । तोंडें तांबडीं अति अळुकीं । तेथें जानकी असेना ॥९७॥

शिंपी : शिंपियाची अति कुसरी[२] । घेवोनि लोभाची कातरी। अखंड खंडी नानापरी । गुप्तत्वें चोरी त्यामाजी॥९८॥ पहिले अखंड खंडिलें। शिविल्या म्हणती त्या दंडिलें। शिंपियें ऐसें कर्म केलें। बाधक झालें त्याचें त्यासीं॥९९॥ अखंड खंडोनि करिती चोरी । तेणें शृंगारी कुंवारी नारी । बिरडें लावी गळ्यावरी। घरोघरीं टांचूनी॥१००॥ ऐसें कर्म केलियापाठीं । शिंपीं सलोभ बोटें चाटी । पोट न भरे शिवण्यासाठीं । सीता गोरटी तेथें कैंची ॥१॥

रंगारी : रंगशाळा अलोलिक । काळें करिती शुद्धसात्विक । काळे हात काळें मुख। अति रंगित रंगारे ॥२॥ नामरूपाच्या ठशावरी । काळेंबेरे पालव धरी । ऐसिया रंगारियाच्या घरीं । सीता सुंदरीं लाभेना॥३॥

वेदपाठक : वेदपाठका नवलपरी । अनाध्याय स्वाध्याय घरीं । उदात्त[३] अनुदात्त[४] स्वरीं । वर्णोच्चारीं अभिमान ॥४॥ सानुनासिक अनुनासिक । उच्चार नेणतां निर्नासिक। त्याशीं हांसती वेदपाठक । एकासी एक उपहासिती ॥५॥ ऐसें करितां वेदपठण । कोरडी शब्दांची खणखण । न वचती मानाभिमान । सीता चिद्रत्न तेथें कैचें ॥६॥

शास्त्री-पंडित : पाहतां विद्वांसांचें व्याख्यान। शास्त्रव्युत्पत्ति[५] अति सज्ञान। ज्ञातेपणें गर्वाभिमान। जडला तो जाण सोडीना॥७॥ जंव जंव शास्त्राची व्युत्पत्ती । तंव तंव अभिमानाची वस्ती । तेणेंचि गर्वाची होय स्फूर्ती । सीता सती तेथें नाहीं ॥८॥

ज्योतिषी : पाहतां ज्योतिष्यांची स्थिती । ते गोंविले ग्रहगतीं । अवघ्या ग्रहगतीं लाविती । सीतासती तेथें नाहीं॥९॥ हाट[६] चोहट[७] पण विपण। शोधशोधू पाहे आपण। पदोपदीं सावधान। सीता चिद्रत्न स्वयें पाहे ॥१०॥

सर्व लोकांमध्ये : देखतां कणांचिया राशी। निजबीजत्वें पाहे सीतेसी। फुलें गुंफितां फुलारियासीं । पाहे सुवासीं सीतेतें ॥११॥ वाणी पसारीं[८] पाहतां। सीता पाहे आंतले पोतां । अंतर सांठवणें आंतौता। होय पाहता सीतेतें ॥१२॥ जे जे मार्गीं जन भेटती । त्यांमाजी पाहे सीता सती। अश्वगजांहि आंतौतीं । सीता सती पहातसे ॥१३॥ उत्तम देखोनि पक्वान्न। सबाह्य सीता पाहे सावधान । हनुमंता नाठवे अन्न। लागलें ध्यान सीतेंचे ॥१४॥ घरें चत्वरें परुसद्वारें । उपऱ्या[९] आटाळ्या[१०] ओवरें । सीतेलागोनि वानरें । सर्वांतरें शोधिलीं ॥१५॥ अंतरीं देखोनि विषमस्थिती। सीता न लभे म्हणे मारुती । लंका शोधित असे ऐशिया रीतीं। सीता सती भेटावया ॥१६॥ दृष्टी पडे जिकडे जिकडे । सीता पाहे तिकडे तिकडे। सवेग तेथूनियां उडे । सीता पुढे पुढें पहातसे ॥१७॥ पाहतां जंबुमाळीमळे । तंव ते लवलवती फळे । हनुमंत उपडी समूळ मूळें । जनकबाळीं शोधावया॥१८॥ सांदीकोंदी नदोनदीं । सीता पाहे बिंदोबिंदीं[११]। शोधितां लंकेची[१२] पैं मांदी[१३]। कोणी शुद्धी सांगेना ॥१९॥ शोक नाहीं जियें स्थानीं । सीता वसे अशोकवनीं । ते तंव वार्ता न वदे कोणी । शुद्धि कैसेनि होईल ॥२०॥

शब्दार्थ : १. बरोबर, २. कौशल्य, ३. ऱ्हस्व, लघु, ४. दीर्घ, गुरु, ५. शास्त्राचे ज्ञान, ६. बाजार, ७. चवाठे, ८. व्यापारी, ९. माड्या, १०. धर्मशाळा, ११. प्रत्येक गल्लीत, १२. सर्व लंका, १३. वोवरे

सर्व स्थळे शोधून हनुंताचे पुढे गमन : घरें शोधिलीं विचित्र। तेथें न लभेचि साता सुंदर। उद्भट घरें थोर थोर। तींही वानरें शोधिलीं॥२१॥ इंद्रजितकुंभकर्णस्थान। श्रेष्ठ सेनानीं[1] प्रधान। रावणाचें निजभुवन। निद्रास्थान शोधिलें ॥२२॥ हनुमंत बळिया महाबळी। घेईल रावणाची घरधांडोळी। नगरामाजी लावील कळी। करील रांडोळी सभेमाजी॥२३॥ ऐसें आश्चर्यचरित्र। हनुमंत करील अद्‌भुत। श्रोतीं व्हावें दत्तचित्त[2]। कथा विख्यात श्रीराम॥२४॥ एका जनार्दनाशरण गोड घांस रामायण। तें हें सुंदरकांड जाण। समाधान जीवशिवां ॥२५॥

इति श्रीभावार्थरामायणे सुंदरकांडे एकाकारटीकायां लंकाशोधनं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥ ओंव्या ॥ ॥१२५॥ श्लोक ॥४॥ एवं॥१२९॥

## अध्याय दुसरा

॥ श्रीसीतारामाभ्यां नमः ॥

॥श्रीराम समर्थ॥

### सीतेचा शोध

नगरशोध केल्यानंतर राजवस्तीत हनुमंत जातो : हनुमंत महावीरें। लंका शोधिली घरोघरें। हाट[3] चोहाटें चौबारें। गुप्त ओवरें स्त्रियांचीं॥१॥ ऐसें शोधितां नगरांत। न लभेचि सीताशुद्ध्यर्थ। राजवर्गाच्या गृहांत। सीता हनुमंत पाहों रिघे ॥२॥

विचक्रमे गृहान्वेगात्प्रहस्तस्य निवेशनम्। ततो न देवीति गृहं महापार्श्वस्य वीर्यवान् ॥१॥
महोदरस्य च तथा महाकायस्य चैव हि। विद्युज्जिव्हस्य भुवनं जंबुमालेस्तथैव च ॥२॥
वज्रदंष्ट्रस्य च तथा शुकसारणयोरपि। विद्युन्मालेः सुमालेश्च विकटस्याप्यतुर्बलेः ॥३॥
बहुशत्रोः सूर्यशत्रोः कुमित्रामित्रयोस्तथा। चित्रकस्य विचित्रस्यातिगर्विंशठमित्रयोः ॥४॥
ताम्राक्षस्य च धूम्रस्य मकराक्षमृगाक्षयोः। लंबजिव्हविरूपाक्षाक्षादीनां च महाबलः ॥५॥

मारुती उड्डाण करून प्रहस्त प्रधानादिकांची घरे शोधितो : करोनि उड्डाणाची थोरी। हनुमंत रिघे प्रहस्तमंदिरीं। शोधिलीं घरें ओवरींओवरीं। स्त्रियांमाझारीं जानकी नाहीं ॥३॥ तेथें न लभेचि जाण। मग करोनियां उड्डाण। प्रहस्त महाबळिया प्रधान। त्याचेंहि भुवन शोधिलें ॥४॥ तेथोनि उडोनि झडकरी। शोधावया सीता सुंदरी। रिघोनि महापार्श्वाचे घरीं। अंतःपुरीं शोधित ॥५॥ तेथें न लभेचि सीताशुद्ध्यर्थ। तेथूनि उडाला हनुमंत। महोदराच्या घराआंत। असे पाहत जानकी ॥६॥ अतिकाय महाकाय। यांचीं घरें शोधित जाय। अखया कुमराचें ठाय। शोधोनि पाहे वैदेही[4] ॥७॥ वज्रदंष्ट्र आणि जंबुमाळी। तेथे शोधिली जनकबाळी। विद्युज्जिव्ह महाबळी। तेथें घरधांडोळी घेतली ॥८॥ रावणाचा आप्त पूर्ण। शुक आणि तो सारण। त्या दोघांचीं घरें जाण। पाहे आपण हनुमंत ॥९॥ विद्युन्माळी आणि सुमाळी। विकटशत्र आतुर्बळी। यांचे घरीं जनकबाळी। घेतां धांडोळी न लभेचि ॥१०॥ बहुशत्र आणि सूर्यशत्र। अमित्र कुमित्र शठमित्र। अति गर्वी चित्रविचित्र। पवनपुत्र घरें शोधी ॥११॥ धूम्राक्ष आणि ताम्राक्ष। विरूपाक्ष आणि मकराक्ष। शोधावया मृगशावाक्ष। परम अतिं दक्ष कपि शोधी ॥१२॥ घस प्रघस महघस। चौथा जो कां वीर विघस। हनुमंत शोधी सावकाश। द्यावया घस[5] रावणासी ॥१३॥ शठ निशठ महाशठ। भट उद्भट महाभट। हींहीं घरें शोधूनि स्पष्ट। निघे मर्कट पुढारां ॥१४॥ युद्धोन्मत्त महोन्मत्त। वीर वाटीव[6] अति उन्मत्त। घरें शोधोनि समस्त। निघे हनुमंत पुढारां ॥१५॥ भीम महाभीम सभीम। तिघांची

शब्दार्थ : १. सेनापती, २. सावधान, ३. बाजार, ४. जनककन्या (सीता), ५. काळेपणा, ६. शौर्याचे.

मारुती । चिंतावर्ती इंद्रजित ॥५८॥ न चले शस्त्रांस्त्रांची शक्ति । मागें न पळवे पुच्छहातीं । पुढें नाटोपे मारुती । चिंतावर्ती इंद्रजित ॥५९॥ चिंताग्रस्त देखोनि त्यातें। हनुमान म्हणे इंद्रजितातें। शिळा शिखरें न हाणी तूतें। न हाणीं पर्वतें भाक माझीं ॥६०॥ इंद्रजित नांवाचा बडिवार । जिहीं बाणीं त्वां जिंतिला इंद्र । तिहीं बाणीं दंडोनि वानर । करीं गजर विजयाचा ॥६१॥ जया बाणांच्या कडाडीं । देव घातले बांधवडीं। ते बाणीं मज विंधोनि प्रौढी। उभारीं गुढी विजयाची ॥६२॥ ऐसें बोलतां वानर । इंद्रजित कोपला दुर्धर । निर्वाणशस्त्रांचा विविध मार । महाघोर मांडिला ॥६३॥

शरणामग्रतस्तस्य पुनः समभिवर्तत । प्रसार्य हस्तौ मतिमानुत्पपातानिलात्मजः ॥१॥
परस्परं दुर्विषहौ बभूवतुः समेत्य तौ देवसामानविक्रमौ
ततस्तु लक्ष्ये प्रविहन्यमाने शरेष्वमोघेषु च संपतत्सु ॥२॥

रणा पाडिल्या मारुती । मंत्रयुक्ती शरणशक्ती । इंद्रजित विंधी व्युत्पत्ती । कपिप्रयुक्ती ते ऐका ॥६४॥ इंद्रजित विंधी मारका शक्ती । हनुमानाचे रणव्युत्पत्ती । रामनामाच्या आवर्ती । निःशंकस्थिति वानर ॥६५॥

इंद्रजिताचेच बाण त्याच्यावरच परतविण्याचा हनुमंताचा विक्रम : निर्वाणबाण वीर मोकली । हनुमान वरचेवरी झेली । पुच्छें करोनि गटांगुळी । दावी गोळांगुळ[१] वांकुल्या ॥६६॥ कोपें भडका उठोनि पोटीं । इंद्रजित वर्षे बाणकोटी । हनुमान सावधान दृष्टीं । शरवृष्टी[२] झेलिली ॥६७॥ कवळोनियां त्याचे बाण । हनुमान गगनीं उसळोन । त्याचेनि बाणें त्यासचि जाण । रणकंदन मांडिले ॥६८॥ कपीनें करितां बाणसंपात। इंद्रजित कासावीस होत । सैन्य पडिलें बहुत । जालें विपरीत संग्रामीं ॥६९॥ हनुमंतेसीं करितां रण । इंद्रजित भुलला संपूर्ण। आपुलें सैन्य मारी आपण। निर्वाणबाण वर्षोनी॥७०॥ धनुष्यबाण कपीपासीं । हे सामुग्रीं नाहीं त्यासीं । आलीसे भुली इंद्रजितासी। निजसैन्यासीं मारित॥७१॥ माझे निर्वाणीचें बाण । वानरें कवळोनि संपूर्ण । आमच्या बाणी आम्हांसीं जाण । रणकंदन मांडिलें ॥७२॥ माझे सुटलिया शर। भेणें पळती सुरासुर। निःशंक निधडा[३] हा वानर। बाण समग्र झेलिले ॥७३॥ आमचीं शस्त्रें आम्हांवरी । परतलीसे महामारी। आतां राक्षसां कायसी उरी । कपिकेसरी[४] नाटोने॥७४॥ कपिपुच्छाची व्युत्पत्ती। धनुष्य भंगी हातीचे हातीं । रथ उपडितांचि क्षितीं । वारू सारथी निमाले॥७५॥ इंद्रजित उडोनि सत्वर । तेणें सांडिला रहंवर[५]। रणीं उठिला हाहाकार । राजकुमार मारिला ॥७६॥ रामनामाच्या निजशक्ती । निधडा निःशंक मारुती । इंद्रजितासी लाविली ख्याती । केला विरथी रणरंगीं ॥७७॥

सारथी व रथाचा संहार : बाण मंत्र शक्तियुक्त। रणीं वानरें केले व्यर्थ । मारिला सारथी भंगिला रथ। तेणें धाकत इंद्रजित ॥७८॥ दिव्य अस्त्रें एकैक। वानरें केलीं निरर्थक। इंद्रजितें घेतला धाक । जीवीं धुकधुक लागली ॥७९॥ न चले शस्त्रांची खटपट । न चले मंत्रास्त्रनेट । न चले कपिपुच्छासी कपट । रणीं उद्‌भट मंत्रास्त्रनेट । न चले कपिपुच्छासीं कपट रणीं उद्‌भट गांजिले ॥८०॥

नंतर उभयतांचे मल्लयुद्ध, इंद्रजित मूर्च्छापन्न : खुंटली शस्त्रास्त्रांची युक्ती। वानर विचारीत चित्तीं । मल्लविद्येची व्युत्पत्ती । शरीरशक्ती पाहूं याची ॥८१॥ इंद्रजित पडिला अति संकटीं । तव वानर झोंबिंनला कंठीं । दोघां झाली लटापटीं । धिंगामस्ती मिसळले ॥८२॥ उरींशिरीं आणि कोपरीं । तडवें हाणिती परस्परीं। कळा लावोनि भुजांतरीं[६] । हाणिती उरीं चपटेघात ॥८३॥ सदा तूं सेविसी घृतक्षीर । आतुर्बळिया राजकुमार । मी वानर पालेखाईर । मजसमोर

शब्दार्थ : १. वानर (मारुती), २. बाणांची वृष्टी, ३. शूर, ४. वानरश्रेष्ठ, ५. रथ, ६. बाहूत.

राहें पां ॥८४॥ ऐसें बोलोनि हनुमंत । मल्लव्युत्पत्ती हाणी लात । ते जंव चुकवी पिलंगत[1] । तंव ठोकित तळवेनी ॥८५॥ तो जंव चुकावी आघात । तंव तळपोनियां हनुमंत । उरीं शिरीं ललाटीं घात । स्वयें हाणित अनुबंधें[2] ॥८६॥ करितां मल्लविद्यामार । रणीं गांजिला निशाचर । भवंडोनियां सांडी चक्राकार । जीवें वानर न मारीच ॥८७॥ इंद्रजित रुधिर वमून। रणीं पडिला मूर्च्छापन्न । त्यासी न मारीच आपण । श्रीलक्ष्मण यासी हंता ॥८८॥ भूतळीं समस्त ऋषीश्वर । गगनीं सुरनर किन्नर । अवघे करिती जयजयकार । विजयी वानर श्रीरामें ॥८९॥ रणीं इंद्रजित मूर्च्छापन्न। स्वयें होवोनि सावधान। अतिशयेंसीं लज्जायमान। अति उद्विग्न इंद्रजित ॥९०॥

इंद्रजिताचा उद्वेग व भीती : हनुमंताची धैर्यवृत्ती। हनुमंताची शौर्यशक्ती । हनुमंताची संग्रामगती । अतर्क्य स्थिति तर्कवेना ॥९१॥ रणीं इंद्रातें जिंकोन । पावलों इंद्रजित अभिधान[3] । वानरेंसीं करितां रण। तृणासमान मज केलें ॥९२॥ मी एक गाढा वीर सृष्टीं । ऐसा फुगारा होता पोटीं। कपिपुच्छें पुरवोनि पाठी। तृणासाठीं मज केलें ॥९३॥ जळो माझी वीर्यवृत्ती। जळो माझी शौर्यशक्ती । रणीं नाटोपे मारुती। कीर्ति अपकीर्ति मज माझी ॥९४॥ कोणी एखादी युक्ती। न चले वानरासीं निग्रहार्थी[4] । जळो माझी यश कीर्ती । चिंतावर्ती इंद्रजित ॥९५॥ माझ्या वरदाची वरदोक्ती । मारूं न शके मज मारुती । धरोनि नेलिया रामाप्रती। विटंबिती वानर ॥९६॥ रावणें आणिलें सीतेसी। बदला मज नेईल रामापासीं । तेथें करितां अपमानासीं । वानरांसी कोण वारी ॥९७॥ रावण होवोनि भिकारी । चोरोनि आणिली सीता सुंदरी । वानरें करोनि झुंझारी । मज निर्धारीं नेईल ॥९८॥ पूर्वी अंगद पाळण्यासीं। खेळणें बांधिलें रावणासी । पौलस्तीनें मागतां त्यासी । अपमानेंसीं सोडिलें ॥९९॥ मुंडोनियां खांडमिशी । मसी लावोनि दशमुखांसी। पांच पाट काढोनि शिरासीं । ऐसा लंकेसीं झुगारिला ॥१००॥ पडतां लंकेचे चौबारां[5]। हुरो[6] लाविला दशशिरा । कोण आंवरी लहानथोरां । लंकेश्वरा अति लाज॥१॥ मज धरोनि नेल्यापाठीं। माझीही होईल ऐशीच गोष्टी। वानर नाटोपे जगजेठीं। पुच्छें पाठी पुरविली॥२॥ पुच्छीं बांधोनि तत्वतां । मज हनुमंतें धरोनि नेतां । धांवण्या कोणी न ये सर्वथा। परम चिंता इंद्रजिता ॥३॥ अखयाच्या कैवारासीं। कोणा न येववे वानरापासीं। मज बांधोनि नेतां पुच्छीं । धाकें धांवण्यासी कोणी न ये ॥४॥

इंद्रजित बिळात लपतो : ऐसा धाक घेवोनि पोटीं । रणीं वानरा देवोनि पाठी। इंद्रजित पळे उठाउठीं। पुच्छासाठीं धाकोनी ॥५॥ पळतां न पळवे पुढें । पडिलें पुच्छाचें बिरडें । तेथिले विवरामाजी दडे । बहु माकडे गांजिलें ॥६॥ दुस्तर धाक घेवोनि मनीं। गुप्त विवर अशोकवनीं । इंद्रजित तेथें गेला पळोनी । अति दडोनी राहिला ॥७॥

पुच्छाने केलेला सैन्यसंहार व सर्वत्र हाहा:कार : लागों न ये पळत्यापाठीं । हे तंव स्वधर्मयुद्धगोष्टी। इंद्रजिता मारणें नाहीं पोटीं। यालागीं पाठीं न लागेचि॥८॥ पुच्छ म्हणे गा कपिनाथा। कोंडोनि राखिलें सैन्या समस्ता। तूं भागलासी इंद्रजित दमितां। मज युद्धार्था दे आज्ञा ॥९॥ हनुमान म्हणे तुझेनि बळें । म्यां महावीर मारिले खळ । आतां निर्दाळूं हें दळ । मी जातें तूं घालीं वैरण। ऐसें भरडूं राक्षससैन्य । डोळे जे रणकल्लोळ विचारूनी ॥११०॥ करूं यांसी॥११॥ करावया सैन्यसंहार । कपि पुच्छासीं करोनि उरती सघन[7]। रणकंदन विचार। मग दिधला भुभु:कार । राक्षसभार खवळला ॥१२॥

अश्वैरश्वान्गजैर्नागान्योधैर्योधान्रथै रथान् । लांगूलेनाहनत्कांश्चिद्रजवाजिखरोष्ट्रकान् ॥३॥

शब्दार्थ : १. पुढे सरसावून, २.आवेशाने, ३. नाव, ४. बांधण्यासाठी, ५. चवाठ्यामध्ये, ६. हुऱ्यो, फजिती, ७. मोठमोठे.

येतां देखोनि हनुमंत । राक्षसवीर समस्त। होवोनियां एकभूत । शस्त्रें वर्षत समकाळ ॥१३॥ बाणीं खिळिलें पृथ्वीसीं। शस्त्रें न समाती आकाशीं । शस्त्रीं बुजिलें हनुमंतासीं। वीरीं राक्षसीं गर्जोनी[1] ॥१४॥ हनुमान युद्धीं निगरघट । राक्षस हाणिती भट सुभट । हाणितां शस्त्रें होती पीठ। अहा कटकट[2] राक्षसां ॥१५॥ हनुमंत निधडा वीर । साहोनि त्यांचा शस्त्रसंभार । करावया सर्व संहार। रणीं वानर खवळला ॥१६॥ अश्वीं अश्वांतें मारित। गजीं गजा संहारित। रथीं रथांतें उपटित। वारुनि मत्त सारथींसी ॥१७॥ पायींचा पायीं रगडित। वीरें वीर पैं झोडित । ध्वज शस्त्रें छत्रें मोडित । रणीं पाडित महामारे ॥१८॥ हनुमान युद्ध करी भिन्न । पुच्छें करी भिन्न कंदन । तेंही ऐका सावधान । रणमर्दन पुच्छाचें ॥१९॥ शायशीं प्रयुतें मत्त हस्ती। पुच्छें उपटोनि मारुती। हस्तींच्या पिष्ट केल्या अस्थी। रणसमाप्ती गजदळा ॥१२०॥ विदारितां कुंभस्थळा । विखरा[3] होय गजमुक्ताफळां । त्याचि रणरंगीं रंगमाळा। अति सोहळा युद्धाचा ॥२१॥ पुच्छ रिघोनि सैन्यातळीं । महावीरां बांधोनि मोळी । उपडी त्यासीं भूतळीं। करी रांगोळी तळिल्यांची[4] ॥२२॥ अश्वतर[5] खर[6] उष्ट्र[7]। पुच्छीं बांधोनि अपार । तळीं उभे अश्वसंभार । घायीं चकचूर करी त्यांचा ॥२३॥ कपिपुच्छाचा महामार । रणीं उठिला हाहाकार । येरीकडे हनुमान वीर। करी रणमार तो ऐका ॥२४॥

तलेनाभ्यवधीत्कांश्चित्पद्भ्यां कांश्चित्परंतपः। मुष्टिभ्यामवधीत्कांश्चिन्नखैः कांश्चिद्व्यदारयत् ॥४॥
प्रममाथोरसा कांश्चिदूरुभ्यामितरान्कपिः । केचित्तस्यैव नादेन तत्रैव पतिता भुवि ॥५॥
विनेदुर्विस्वराञ्चाद्याश्चिपेतुर्भुवि वाजिनः । भग्ननीडध्वजच्छत्रो भुवि कीर्णोऽभवद्रथः ॥६॥
स कपिर्नाशयामास राक्षसान्बलदर्पितान् ॥७॥

रागें हाणितां थापडी। वीर मारीत लक्षकोडी। कोट्यनुकोटी पायीं रगडी। मुष्टिपडिपाडीं असंख्य ॥२५॥ बहुत चिरफाळी नखाग्रीं। एकें मारिलीं जानुचक्रीं। जानुवा[8] अपाना बहुतां मारी। अर्धचंद्री पैं एकें ॥२६॥ आंवळोनि उरावरी । वीर मारीत शतसहस्रीं। तडवे हाणोनि उपराउपरीं। लक्षांतरीं मारित ॥२७॥ देतां भुभुःकार प्रबळ । रणीं उठिला हलकल्लोळ। भेणेंकरोनि मूत्रमळ। प्राण तत्काळ सांडिला ॥२८॥ हनुमंताचे गिरागजरें। आक्रंदोनि वाजिकुंजरें । रणी निमालीं अपारें । लक्षांतरें वीरश्रेणीं ॥२९॥ भोंवता पुच्छाचा आंवर्त[9]। मध्यें मारितो हनुमंत । जाला सैन्याचा अंत । आला प्राणांत राक्षसां ॥१३०॥ पुच्छें पुरविलीसें पाठी। होवों नेदी कुटुंबभेटी। लंका पाहूं नेदी दृष्टीं । जीवासाठीं राक्षसां ॥३१॥ रणीं महामारी हनुमंत । पुच्छ पळों नेती नगरांत। जो तो लपे प्रेताआंत। मिथ्या मूर्च्छित वीरश्रेणीं ॥३२॥ एक घायें घाबरलीं वेडीं । एक नागवी उघडीं। एक पडिलीं उपडीं। मेलीं मढीं होवोनि ठेली ॥३३॥ झाडिला इंद्रजिताचा पादाडा[10]। केला सैन्याचा नितोडा[11] । रामनामे हनुमान गाढा। केला झगडा निजनेटें ॥३४॥ युद्ध झालें अति कर्कशीं । रणीं निर्दळिलें समस्तासीं । हाव[12] न बाणे हनुमंतासीं । राक्षसांसी मारित ॥३५॥ रथ भंगिलें कोट्यनुकोटी। मारिल्या अश्वगजांच्या थाटी । छत्रें भंगिलीं तीं सृष्टीं । ध्वजा कोटी विखरल्या ॥३६॥ अशुद्ध वाहत गडगडाडीं। तेचि रणनदी गाढी। जालिया प्रेतांच्या दरडी। गजकरवडी महाग्राह ॥३७॥ तीर वाहती सपिच्छीं । तेचि मासे रणनदीसीं । वोडणें वाहती कासवें जैसीं । सर्प सपुच्छीं रणभाले ॥३८॥ मेद मांस अति दुर्गम। तेचि दोहीं तीरींचा कर्दम । विक्राळ शिसाळें विक्रम । सुसरी परम दोहीं भागीं ॥३९॥ मोक्षसुखाची सुरवाडी[13] । रणनदी वाहे पूराडीं । सर्वस्वात्यागें जो घाली उडी। त्याचिये जोडी तो जोडे ॥१४०॥ ध्वजेंसीं वाहे रंहवरू[15] । तेंचि शिडेंसहित तारूं। येथें तारक श्रीरामचंद्रू। परपारू पाववी ॥४१॥

शब्दार्थ : १. घटावलेला, २. हायहाय, ३. पसारा, ४. खाली पडलेल्याची, ५. गाढव, ६. उंटे, ७. गुडघे, ८. गचांडीने, ९. वेढा, १०. गर्व, ११. नाश, १२. वीरश्री, १३. सुखाने, १४. प्रवाहाने, १५. रथ.

भूतादि शंखिणी, डाखिनी देवतास आनंद : उदो म्हणोनि भद्रकाळी । घेवोनि आली भूतावळी । खाती मांसाच्या वडवाळी[१]। रुधिरांजुळी प्राशिती ॥४२॥ यक्षिणी बहुकाळाच्या वृत्ती । लाखोली काळिजें घेवोनि हातीं। शंखिणी डाकिनी वाणें देती । मग भक्षिती स्वानंदें ॥४३॥ आनंदें नाचे क्षेत्रपाळ। शिरें चौडकें वाहे वेताळ । भूतें मिळोनिया सकळ । रणगोंधळ नाचती ॥४४॥ बहुतां दिवसांचे धरणें । दिधलें हनुमंतें पारणें । अवघे घालिती लोटांगणें । विजयी होणे रणरंगीं॥४५॥ पीक पिकलें रणचत्वरीं[२]। राक्षसदांतांच्या राशी थोरी । भूतें मोविती[३] कुडवेंकरीं। कौलकरी[४] हनुमंत ॥४६॥ देव ब्राह्मण भैरवासी । बलुतें[५] देती वेताळासी। खळेंदान तें भूतासी। महाकाळीसी राजभाग॥४७॥ खळमातेरें मारकोसी। मेसको तिचे घरची दासी। वेसी पेंढी ते सटवाईसी । पाळभारियासीं काळिका ॥४८॥ अग्रिम[६] पिकाची व्युत्पत्ती । विभागली स्वयें मारुती। पश्चिम धान्याची महाख्याती । श्रीरघुपती विभागील ॥४९॥

ते वर्णन ऐकून वानर सैन्यात हर्ष : कुडवें दांत मेविजेती। ऐसी हनुमंते केली ख्याती। हर्षानंदें कपी गर्जतीं । स्वयें उपरमती आल्हादें ॥१५०॥ आमुचा हनुमान आतुर्बळी । रणीं राक्षसां केली रांगोळीं। वानरीं पिटोनियां टाळी। सुखसमेळीं नाचती॥५१॥ सुग्रीव राजा तये वेळीं । आणोनियां द्रव्यांजुळी । हनुमंतावरी ओंवाळी। हृदयकमळीं आलिंगी ॥५२॥ तूं विसावा कपिकुळासी । सुखी केलें श्रीरामासी। वांचविलें वानरांसी। यश आम्हांसी तुझेनि ॥५३॥ स्फुरण आलें अंगदासी। खांदीं घेवोनि हनुमंतासी । हरिखे नाचतां चौपासीं। कळिकाळासी विटावी ॥५४॥ धरिल्या हनुमंताचे चरण । कळिकाळ बापुडें तें कोण। करोनि हनुमंताचे स्फुरण। मरणा मारीन मी आतां ॥५५॥

श्रीरामांना आनंद व विस्मय, मारुतीला आलिंगनः हनुमंताचें अगाध चरित्र। ऐकोनियां ब्रह्मलिखित । श्रीराम होवोनि समस्त। आलिंगीत हनुमंता ॥५६॥ परमामृतें अभिषिंचन । नेत्रद्वारा रघुनंदन। हनुमंतासी करी आपण। स्वर्गीं सुरगण विस्मित ॥५७॥ कृपा करील रघुनंदन। हनुमंताचें भाग्य गहन। स्वमुखें वानी त्रिनयन। भेरी निशाण लावोनी॥५८॥ आलिंगितां हनुमंता । राम विसरे श्रीरामता । कपि विसरे वानरता। एकात्मता आल्हाद ॥५९॥ सांडोनियां मीतूंपण । देवां भक्तां आलिंगन। खुंटला बोल तुटले मौन। सुखसंपन्न श्रीरामें ॥१६०॥ निबिड आणि नित्य निघोट[७]। सुख कोंदले घनदाट । नाहीं आदि मध्य शेवट । न चले वाट वेदवादा ॥६१॥ जेथें मौनावल्या श्रुती। तेथें पावला मारुती । सार्थक हनुमंताची भक्ती। पावन कीर्ति तिहीं कीं ॥६२॥ स्वयें सुखावे रघुनंदन । ऐसें हनुमंताचें भजन। पायां लागे ब्रह्मज्ञान । एकाजनार्दना उपदेश ॥६३॥ नित्य श्रीरामस्मरण। नित्य श्रीरामनामभजन। एकाजनर्दना शरण । ब्रह्मज्ञान हरिभजनीं ॥१६४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे सुंदरकांडे एकाकारटीकायां ब्रह्मलिखितइंद्रजितअपमानहनुमंत पराक्रमवर्णनं नाम एकत्रिंशत्तमोऽध्यायः ॥३१॥ ओंव्या ॥१६४॥ श्लोक ॥७॥ एवं ॥१७१॥

## अध्याय बत्तिसावा

॥ श्रीहनूमते नमः ॥

### हनुमंताकडून रावणाचे गर्वहरण

लक्ष्मणाकडून पुढील वर्णनाचे वाचन : श्रीराम होवोनि सावचित । लक्ष्मणासीं स्वयें सांगत। पुढारां वाचीं ब्रह्मलिखित। अनुचरित[८] कपीचें ॥१॥ राक्षसदांतांचिया रासी। पाडोनि केलिया रणभूमीसीं । पुढें काय केलें लंकेसीं। तें मजपासी परिसवीं[९] ॥२॥ ऐकोनि श्रीरामाची गोष्टी ।

शब्दार्थ : १. ग्रांस, २.रणांगणात, ३. मोजतात, ४. कौल देणारा, ५. देणगी, ६. पहिल्या पिकाची, ७. दृढ, ८. वर्तन, ९. ऐकव.

सुग्रीवासी आल्हाद पोटीं । हर्षल्या वानरांच्या कोटी। कथाकसवटी ऐकावया ॥३॥ वानरांच्या निजकोडी। सभा बैसली परवडी । हनुमंताची प्रतापप्रौढी । अति आवडीं ऐकावया ॥४॥ हनुमंताची प्रतापकीर्ती । वाचितां लक्ष्मणा परम प्रीती । अनुलक्षोनि श्रीराममूर्ती। पत्र प्रयुक्ती वाचित॥५॥

इंद्रजिताचा पाडाव करून हनुमंत आपली शेपटी आवरून बसला : झाडोनि इंद्रजिताचा पादाडा[१] । करोनि सैन्याचा नितोडा[२]। काढोनि कपिपुच्छाचा वेढा। हनुमान गाढा बैसला॥६॥ पुढती करावया रण। कोण कोण धाडी रावण । त्यांचें करावया निर्दळण । सावधान बैसला ॥७॥

त्याचे उरलेले सैन्य रावणाला सर्व वृत्त निवेदन करते : गेला देखोनि हनुमंत । मीस करून वीर समस्त । आणिक घायाळ कुंथत । नगराआंत निघाले ॥८॥ वीरीं घेतलें घायवारें[३] रावणाचे सभेमाझारें । म्हणती पळा रें पळा रे । रणीं वानरें मारिजेल ॥९॥ रावण बापुडें तें किती । युद्धी नाटोपे मारुती । सेनानी[४] सैन्य नेलें भस्मांतीं। करील शांति लंकेची ॥१०॥ समस्त सैन्या केली बोहरी[५]। बोंब सुटली घरोघरीं। कळकळती नगरनारी। लंकापुरी आकांत ॥११॥ समरीं रावणाची थोरी। चोरोनियां परनारी। केली राक्षसांची बोहरी । महामारी वानरें ॥१२॥ रणीं रावण मरता । लंकालोक स्वस्थ होता । करविलें इंद्रजिताच्या घाता । रणीं हनुमंता खवळोनी ॥१३॥ करितां अखयाचा कैवार। रणीं मारविला ज्येष्ठ कुमर । बोंब करितां निशाचर[५] । दशवक्त्रा हडबडिला ॥१४॥

इंद्रजिताचा ठाव नसल्याने त्याविषयी मनात कुशंका : इंद्रजित मेला किंवा जीत[६]। कोणी न सांगती मात । तेणें गजबजिला लंकानाथ । केला रणघात वानरें ॥१५॥ इंद्रजित मारिला रणीं । तरीच मारिल्या वीरश्रेणीं । तो जरी असता सावधानी । कपि कैसेनि मारिता ॥१६॥ शोधूं जावें जरी रणासीं । राक्षस भिती कपिपुच्छासीं । भूतीं भक्षिलें प्रेतांसी । तेथें कायसी ओळखी ॥१७॥

रावणाचा शोक व ब्रह्मदेवास पाचारण : रणीं निमाला ज्येष्ठ सुत। रावण मुखीं धूळ घालित । दाही मुखी शंख करीत । आक्रंदत अति दुःखें ॥१८॥ दुःखें गडबडां लोळे । केश सुटले मोकळे । अश्रु स्रवतीं विशंती[७] लोळे । पिटी कपाळें अति दुःखे ॥१९॥ इंद्रजिताचा केला घात । रणीं नाटोपे हनुमंत। वानरीं न चले पुरुषार्थ। लंकानाथ अति दुःखी ॥२०॥ ब्रह्मयानें सांगितलें मजपासीं । गळां बांधोनि वानरासी। इंद्रजित आणील तुजपासीं । असत्य त्यासी केंवी आलें ॥२१॥ पाचारोनि चतुरानन। त्यासी पुसे दशानन। इंद्रजित आणील कपि बांधोन । तें तूं वचन करी सत्य ॥२२॥

व त्याचें वचन सत्य करण्याचा आग्रह : आम्हीं तंव तुझी संतती । तुझेंनि वरदें दाटुगे क्षिती[८]। मज भेटवीं पुत्रसंतती । चरण तदर्थीं[९] वंदिले॥२३॥ इंद्रजिताच्या निजवृत्तांता। तुझेनि नाणवे गा दूता । करितो कपि राक्षसघाता। त्यासी सर्वथा न वंचवे ॥२४॥ मीच जावोनि अशोकवना। इंद्रजिताची विवंचना[१०]। समूळ जाणोनियां मना। मग दशानना सांगेन ॥२५॥ इंद्रजित मेला किंवा जित। ग्लानीं पुसें लंकानाथ । वानरें गांजिला अत्यद्भुत । आहे तो गुप्त म्हणे ब्रह्मा ॥२६॥

ब्रह्मदेव मारुतीला भेटून त्याला पाशबद्ध होण्यास सांगतो : ऐसें सांगोनि लंकापती। वना आला प्रजापती । ब्रह्मा देखोनि मारुती। घातलें क्षितीं लोटांगण॥२७॥ कपि पुसे ब्रह्मयाप्रती । ऐसीं आवडी आहे चित्तीं । तुकोनि रावणाची शक्ती । करावी ख्याती लंकेसीं

---

**शब्दार्थ :** १. गर्व, २. नाश, ३. शस्त्रप्रहाराचे भय, ४. सेनापती, ५. राक्षस, ६. जिवंत, ७. वीस, ८. पृथ्वीवर, ९. त्यासाठी, १०. शोध.

॥२८॥ ब्रह्मा सांगे हनुमंतासी। इंद्रजित तुझेनि भयेंसीं। लपालासें विवर प्रदेशीं। मी त्यापासीं जातसें ॥२९॥

राक्षसाच्या हातून केव्हाही बांधला जाणार नाही असे मारुतीचे स्पष्ट उत्तर : इंद्रजिताचें करसंपुटीं ब्रह्मपाश मानोनि कंठीं। यावें रावणाचे भेटी। लंकात्रिकूटीं कंदनार्थ ॥३०॥ कपि म्हणे इंद्रजिताचे हातें। सर्वथा न मानीं पाशबंधातें। ब्रह्मदेवा तुझेनि हातें। ब्रह्मबंधातें मानीन॥३१॥

इंद्रजिताला स्वत: व रावणाविषयी चिंता : ब्रह्मा म्हणे ऐसेंचि घडे। माझेनि हातें वाडेकोडें। हनुमंत पाशबंधनीं पडे। रावणापुढे न्यावया ॥३२॥ रणीं वानरा देवोनि पाठी। पळतां विवरा संकटीं। इंद्रजितासीं चिंता मोठी। लागली पोटीं धुकधुक ॥३३॥ रणीं गांजिलें माकडें। काय मुख दावूं रावणापुढें। इंद्रजित खळखळां रडे। अति सांकडें[1] ओढवलें[2] ॥३४॥ रणीं मज येतें मरण। तरी पावतों कृतकल्याण। वांचल्याचें फळ कोण। काळें वदन तिहीं लोकीं ॥३५॥ इंद्रजित नांवाची हे ख्याती। तिहीं लोकी माझी किर्ती। कीर्ति तेचि झाली अपकीर्ती। रणीं मारुति नाटोपे ॥३६॥ कपि केवळ पालेखाइर। आम्ही निधडे महावीर। रणीं न जिंकवे वानर। लज्जा थोर मज माझी ॥३७॥ काळें वदन लज्जानुवृत्तीं। मरण न ये मज वरदोक्ती। इंद्रजित पडतां चिंतावर्तीं। तंव ब्रह्मोक्ती आठवली ॥३८॥

ब्रह्मदेवाचे स्मरण व आगमन : गळां बांधोनि मारुती। इंद्रजित आणील लंकेप्रती। स्वमुखें बोलिला प्रजापती। तो मज प्रत्यय[3] यावा कीं ॥३९॥ पाचारावया चतुरानन[4]। रणीं नुरेचि सेवकजन। माझा वांचलासे प्राण। विवरीं दडोन राहिलों॥४०॥ धाडावया नाहीं सेवकजन। बाहेर निघतां आपण। रोकडें कपिपुच्छें मरण। करी रुदन इंद्रजित ॥४१॥

इंद्रजित ब्रह्मदेव संवाद : माझे पित्याच्या पित्याचा पिता। कैसेनि भेटेल विधाता[5]। ऐसी इंद्रजित करी चिंता। तंव आला अवचिताळ परमेष्टी ॥४२॥ डोळां देखतांच परमेष्टी। इंद्रजित धीर धरी पोटीं। समूळ सांगे युद्धगोष्टी। केलें कष्टी वानरें ॥४३॥

ततः पैतामहं वीरः पाशं शस्त्रविदां वरः। संदधे स महातेजास्तं हरिप्रवरं प्रति ॥१॥

अवध्योयमिति ज्ञात्वा तमस्त्रेणास्त्रतत्त्ववित्। अवध्यं सर्वभूतानां तदस्त्रं न बबंध तम् ॥२॥

रणीं गांजिलों मारुती। तो बांधवे माझे हातीं। ऐसी स्वामीची पूर्वोक्ती। कृपामूर्ति सत्य कीजे ॥४४॥ असत्य नव्हे ब्रह्मवचन। नारदें सांगितलें आपण। कपीसी ब्रह्मपाशबंधन। कृपा करोन मज द्यावें ॥४५॥

त्या ब्रह्मपाशात मारुती बांधला जाईना : मज दिधल्या पाशबंधन। तेव्हां रणरंगीं गर्जोन ब्रह्मपाशीं कपि बांधोन। मग श्लाघेन वाटिवा[6] ॥४६॥

इंद्रजिताने फेकलेला पाश मारुती झुगारतो : विरिंचि देतां पाशबंधन। इंद्रजित मोकली कपि लक्षोन। वानरासी ब्रह्मपाशबंधन। सर्वथा जाण बांधीना ॥४७॥

हरिवरदान हरवरदान। बांधूं न शके ब्रह्मबंधन। पाश गेले पैं तुटोन। निर्बंधन मारुती ॥४८॥ पाशाचिया अनुवृत्तीं[7]। रणीं खवळला मारुती। मरण मज असेल पुढती। इंद्रजिताचे चित्तीं चळकांप ॥४९॥

अहो महत्कर्म कृतं निरर्थकं न राक्षसैर्मंत्रगतिर्विमृष्टा।

पुनश्च नास्त्रे विहतेऽस्त्रमन्यत्प्रवर्तते संशयिताः स्म सर्वे ॥३॥

अस्त्रं तद्धितथं दृष्ट्वा संजगर्ह पितामहम्। अथागतस्ततो ब्रह्मा मारुतात्मजमब्रवीत् ॥४॥

इंद्रजितें ब्रह्मपाश घालिता। ते न लगती हनुमंता। माझा रणधर्म गेला वृथा। जघन्यता[8] मज आली ॥५०॥ माझी अस्त्रशक्ती शस्त्रशक्ती। ब्रह्मपाश ब्रह्मशक्ती। अवघी वृथा केली

शब्दार्थ : १. संकट, २. आले, ३. अनुभव, ४. ब्रह्मदेव, ५. ब्रह्मदेव, ६. पराक्रमाने, ७. योगाने, ८. नीचपणा.

मारुतीं । राक्षसपंक्ती केंवी चाले ॥५१॥ ब्रह्मपाश वृथा जाय । आणीक अस्त्रें करिती काय । वानरीं न चालती उपाय । आला अपाय[1] राक्षसां ॥५२॥ ब्रह्मयानें दिधली खोटी शक्ती । यालागीं न धरवे मारुती । इंद्रजित कोपला ब्रह्मयाप्रती । तुझी दुष्टमति आम्हांवरी ॥५३॥ रावणें विभागिलें वेदांसीं । त्याचा राग तुझे मानसीं । निर्दाळावया राक्षसांसीं । बुद्धि सांगसी हनुमंता ॥५४॥ तूं आमुची मूळमूर्ती[2] । आम्ही तुझी ब्रह्मसंतती । आम्हांसी देवोनि खोटी शक्ती । कपिहातीं मारविसी ॥५५॥

ब्रह्मदेवाचा इंद्रजितावर दोषारोप : ब्रह्मा म्हणे तूं विकल्पमूर्ती[3] । ब्रह्मद्वेषी ब्रह्मघाती । तुझी नातळे ब्रह्मशक्ती । केंवी मारुती बांधवें ॥५६॥ ब्रह्मानुवादाचें उत्तर । गळां बांधोनि वानर । इंद्रजित आणील महावीर । तें साचार करीं वाक्य ॥५७॥ ब्रह्मा म्हणे इंद्रजिताप्रती । माझे पाश दे मज हातीं । गळां बांधोन देईन मारुती । लंकेप्रती न्यावया ॥५८॥ इंद्रजित म्हणे ब्रह्मयासी । म्यां मोकलिलें ब्रह्मपाशासीं । हनुमंतें बांधोनि राखिलें पुच्छीं । म्यां तुम्हांसी काय द्यावें ॥५९॥

ब्रह्मदेव मारुतीला विनवून पाशबद्ध करितो : ऐकोनि इंद्रजिताचें वचन । ब्रह्मा जाला हास्यवदन । कपीस ब्रह्मपाशबंधन केलें । विंदान तें ऐका ॥६०॥

नानृतं मद्वचः कार्यं गृहाणास्त्रं हि वानर । एवमुक्तस्तथा चोक्त्वा बद्धः कपिवरात्मजः ॥५॥
अभिवाद्य विचेष्टः सन्पपात धरणीतले ॥६॥

ब्रह्मा सांगे गा हनुमंता । तुज न लागे पाशबंधता । माझ्या सत्यवचनार्था[4] । ब्रह्मपाशता मानावी ॥६१॥ ऐकोनि ब्रह्मयाचें वचन । हनुमान घाली लोटांगण । तुझेनि बोलें देईन प्राण । पाशबंधन तें किती ॥६२॥ ऐसें बोलोनि हनुमंत । पाशबंधनीं पडे मूर्च्छागत । धरणीवरी निश्चेष्टित । धुकधुकीत भयभीत ॥६३॥ ब्रह्मपाशीं हनुमंत । पडिला देखोनि निचेष्टित । परी तो बंधमोक्षातीत[5] । नित्य निर्मुक्त श्रीरामें ॥६४॥

ते पाहून राक्षसांना आनंद व मारुतीवर सर्वांचे प्रहार : जेंवी रवि थिल्लरांत । मूर्ख मानिती थिल्लरस्थ[6] । तेंवी कपि ब्रह्मपाशांत । बांधिला हनुमंत राक्षसीं ॥६५॥ हनुमान बांधिला ब्रह्मपाशांत । विजयी वीर इंद्रजित । निशाणें[7] त्राहाटिलीं[8] लंकेआंत । लंकानाथ आल्हादे ॥६६॥ ब्रह्मयानें बांधिला हनुमंत । परी ब्रह्मबंधासीं अतीत । देखोनि धाकें इंद्रजित । करील अनर्थ लंकेसीं ॥६७॥

अथ तं राक्षसो दृष्ट्वा निर्विचेष्टमरिंदमम् । बबंध रज्जुपाशैश्च द्रुमचीरैश्च मारुतीम् ॥७॥
कृष्यमाणश्च रक्षोभिस्तैः स्वबंधे प्रतिष्ठितः । हन्यमानस्तथा क्रूरै राक्षसैः काष्ठमुष्टिभिः ॥८॥

क्षितितळीं[9] निचेष्टित । पडिला देखोनि हनुमंत । राक्षस धांवोनि समस्त । त्यासी बांधीत वेलवाखीं[10] ॥६८॥ एक बांधिती चऱ्हाटें । साली बांधिती वृक्षफांटे । देखोनि हांसिजे मर्कटें । बंधन खोटें मजलागीं ॥६९॥ जो न बांधवे ब्रह्मपाशीं । तो केंवी बांधवे चऱ्हाटेंसीं । बंधनमिसें जातों लंकेसी । रावणासी गांजावया ॥७०॥ आम्हांसी गांजिलें अशोकवनीं । रावणा गांजील लंकाभुवनीं । परम चिंता इंद्रजिताचे मनीं । अपेश जनीं मज आलें ॥७१॥ इंद्रजितें हनुमंत । बांधोनि आणिला लंकेआंत । हे अवघीच मिथ्या मात । जातो अनर्थ करावया ॥७२॥ जें ब्रह्मयानें सांगितलें कानीं । तेंचि हनुमंतें धरोनि मनीं । प्रवेशला लंकाभुवनीं । इंद्रजित मनीं भयभीत ॥७३॥ वानर पालेखाइर । त्याचा इंद्रजितासी धाक थोर । आम्ही निधडे निशाचर । क्षणें कपींद्र मारूं या ॥७४॥ म्हणोनि बांधिती रज्जुबंधनीं । एक बांधिती वाख वळोनी । एक बांधिती मुंजी चिरोनी । कपि बांधोनि आणिती ॥७५॥

शब्दार्थ : १. नाश, २. मूळपुरुष, ३. संशयखोर, ४. माझे वचन सत्य व्हावे म्हणून, ५. बंधन व मुक्तता यांपासून वेगळा, ६. डबक्यांत, ७. रणवाद्ये, ८. वाजविली, ९. पृथ्वीवर, १०. वेलींनी व वाकाच्या दोऱ्यांनी

पूर्वपश्चिमउत्तरेसीं। एक ओढिती दक्षिणेंसीं । हनुमाना करिती कासाविसी । कपि मानसीं हांसत ॥७६॥

हनुमंताचे पुढील कार्याविषयी विचार : राक्षसें केवळ वेडीं । व्यर्थ करिती ओढाओढी। लंका करीन कडाफोडी । पाडीन दरडी दुर्गाच्या ॥७७॥ मज नेलिया दुर्गाआंत। महावीरां करीन घात। मुख्य गांजीन लंकानाथ । दहनार्थ लंकेसीं ॥७८॥ कपि बांधिला महाबळी । म्हणोनि राक्षसीं पिटिली टाळी। गुढी आणिली रायाजवळी । सभामंडळीं लंकेच्या॥७९॥ वज्रदेही हनुमंत । बुकी हाणी तो पडे मूर्च्छित । मुसळघायें उखळे हात। वीर मूर्च्छित कपिघातें ॥८०॥

रावणासमोर नेल्यावर त्याचा क्रोध : इंद्रजितासीं समवेत । हनुमान नेतां लंकेआंत। ब्रह्मा स्वमुखें मंत्र जपत । विपरीतार्थ तो ऐका ॥८१॥ गृहा वै प्रतिष्ठा हें सूक्त । ब्रह्मा स्वमुखें गडगर्जत। रामराज्य लंकेआंत। हनुमंतप्रवेशें॥८२॥ रावणें देखोनि वानरा। दांत खाय करकरां। जिवें मारिलें अखयाकुमरा । यासी करा तिळखंड॥८३॥ सकळ सैन्य समसगट। शस्त्रें हाणिती कडकडाट। लागतां शस्त्रें होती पीठ । हृदयस्फोट राक्षसां॥८४॥ एकाचे उखळले हात । वीरीं विचकिलें पैं दांत । धापां दाटले समस्त । पडिले मूर्च्छित एकैक ॥८५॥ हनुमान रामनाम जपत । ससैन्य शस्त्रें हताहत। तें देखोनि लंकानाथ। कोपें कृतांत पैं जाहला॥८६॥

रावणाचा खड्गप्रहार निष्फळ : रावणें खड्गा घातला हात । बळें हाणितां हनुमंत। झणाणिला लंकानाथ। शस्त्रें हात लचकला॥८७॥ धावो हाणितां प्रचंड। दणाणिलें त्याचें ब्रह्मांड । सरलें रावणाचें बळबंड । खालतें तोंड तेणें केलें ॥८८॥ घावो न मानीच हनुमंत। रावण चिंताग्रस्त । हनुमान गदगदां हांसत। व्यर्थ पुरुषार्थ रावणा ॥८९॥

त्यामुळे मारुतीकडून रावणाचा धिक्कार : राक्षसघायांचा[1] समेळ। ढेकणाऐसी त्याची बुळबुळ। तुझा घावो अति निर्बळ। जैसी पेळ कापसाची॥९०॥ सावध केलें लंकानाथा। तुझा मज थोर भ्रम होता। घावो हाणोनि आतां । केला वृथा पुरुषार्थ ॥९१॥ तुझ्या घायाच्या समेळीं। माझी न तुटे रोमावळी। श्रीरामासीं रणकल्लोळीं। घेसी फळी कैसेनि ॥९२॥ स्वयंवरीं वाहतां हरकोदंड[2] । तेव्हां जालें काळें तोंड । तें श्रीरामें केलें दुखंड[3]। युद्ध प्रचंड केंवी त्यासी ॥९३॥ तुझें शुभ चिन्ह कळलें आतां। स्वयें जालासी भीक मागता । भिकेमाजीही कपटता। श्रीरामकांता चोरिली॥९४॥ गृहस्थाची जे पत्नी। ती भिक्षुकाची निजजननी। तूं तंव केवळ मातृगमनीं । सीतावरणीं उद्यत॥९५॥ भिक्षा दे वो म्हणसी माते। शेखीं अभिलाषिसी सीते। महापापी तूं सर्वार्थे । संनिपातें घेतलासी ॥९६॥ बाप होणाराची थोरी । राजत्व सांडोनियां दूरी। झोळी घेवोनियां करीं। स्वयें भिकारी जालासी॥९७॥ स्वयें होतांचि भिकारी। राजत्वपदवी पळे दूरी। जळो तें वेदभाष्य तुझी थोरी । परनारी चोरिसी ॥९८॥

रावणाची चिंता : अवध्यता वानरासी। मारितां न मारवे आम्हांसी। विलोकोनि बोलतां सभेसीं। रावणासी अति चिंता ॥९९॥ येथें आणितां हनुमंत। आम्हांसी न जोडे पुरुषार्थ। हनुमान माझा करील घात। चळी कांपत रावण॥१००॥ रावणाचे सिंहासन। तयासमान पुच्छासन । हनुमान बैसला सावधान । दशानन लक्षोनी ॥१॥ दशमुखेंसीं संमुख। वानर बैसला निःशंक । रावणा लागली धुकधुक । अधोमुख स्वयें जाला ॥२॥ इंद्रजितें हनुमंत। धरोनि आणिला लंकेआंत । सत्य जाला ब्रह्मवाक्यार्थ। मज अपघात ओढवला[4]॥३॥ रावणाचें चित्तीं चिंता ऐसीं। कळों सरली हनुमंतासी । वानरचेष्टा मांडिल्या त्यासीं । लंकेशासीं गांजावया ॥४॥

शब्दार्थ : १. राक्षसांचा सारखा मार, २. शिवधनुष्य, ३. दोन तुकडे, ४. येऊन ठेपला.

नंतर रावणापुढे मारुतीच्या चेष्टा व त्याची अवहेलना : रावणसंमुख हनुमंत। बैसोनियां वांकुल्या दावित । कांखा कुशी खाजवीत । पुच्छ लावीत नाकासीं ॥५॥ पुच्छ लावितांचि नाकीं। केश भरले नासिकीं । रावण शिंकेवरी शिंकी। दशमुखीं ओकित ॥६॥ दाहीं नाकीं शिंके थडथडां। होत शेंबुडाचा सडा। सिंहासनीं रोकडा। वानरें गाढां गांजिला ॥७॥ पुढें शिंकेचें पडता नेट। बृहती वाजे परपराट। वानरचेष्टा अति वरिष्ठ। दशकंठ गांजिला ॥८॥

रावण त्यास त्याची माहिती विचारतो : राजसन्मान राजाभिमान। वानरें उडविला संपूर्ण। सिंहासनीं दशानन। लज्जायमान बैसला॥९॥ वानर न गणी राक्षसांसी। दृष्टी नाणी प्रधानासी। रावणें जाणोनि मानसीं। स्वमुखें कपीसी पूसत ॥११०॥

रे रे वानर को भवानहमरे त्वत्सूनुहंताहवे दूतोहं खरखंडनस्य जगतां कोदंडदीक्षागुरोः ।
मद्दोर्दंडकठोरपाटनपटुः को वा त्रिकूटाचले को मैरो क्व च रावणोद्य गणना कोटिस्तु कीटायते ॥९॥

मारुतीचे उत्तर : रावण हेळसोनि बोले उत्तर। अरे तूं कोण कोणाचें वानर। तैसाचि हेळसोनि बोले कपींद्र। ऐकें साचार रावणा ॥११॥ एकें म्हणतांचि अरे। सवेंचि दुसरा म्हणे कां रें। तैसेचि मांडिलें वानरें। निशाचरें हेळसोनी[1] ॥१२॥ मारिले वनकर किंकर। जंबुमाळी प्रधानकुमर। पंच सेनानी मारिले शूर। तो मी वानर हनुमंत॥१३॥ करोनि वृक्षांचा उपाडा। झाडिला इंद्रजिताचा पादाडा। अखया कुमर मारिला गाढा। तो मी निधडा हनुमंत ॥१४॥ कोणाचा म्हणसी कैंचा कोण। येथें यावया काय कारण। पुशिल्या प्रश्नांचें प्रतिवचन[2]। सावधान अवधारीं॥१५॥ सुबाहु ताटकानिर्दळण। त्रिशिरा मारिला खर दूषण। त्या श्रीरामाचा दूत मी जाण। तुझा प्राण घेवो आलों ॥१६॥ कोदंडधारिदीक्षागुरू[3]। सूर्यवंशी श्रीरामचंद्रु। त्याचा दूत मी वानरू। तुझा संहारू करूं आलों ॥१७॥ राक्षसराजा मी रावण। तुज वधावया कैंची आंगवण। तरी माझें बळ असाधारण। नाहीं प्रमाण मारावया ॥१८॥ लागतां बाहूची चपेट। मेरुमांदार होती पीठ। तेथें रावण दशमुख कीट। लंकात्रिकूट तें किती ॥१९॥ रावणाऐसे दशकंठी। रणीं मर्दीन कोट्यनुकोटी। तो मी लंकेची त्रिकूटी। वाममुष्टीं मर्दीन ॥१२०॥ म्हणसी तुजसवें वानर। असती पाठिराखे अपार। मी एकांगवीर[4]। पुरें दशशिर दंडावया ॥२१॥

एकोहं पवनात्मजो दशमुखस्त्वं चापि कोटीश्वर
स्त्वां जित्वा समरे प्रभुः प्रणयवान्सीतां च नेतुं क्षमः ।
किं तस्याघटित बलं बलवता रामेण सुश्रीमता
हत्वा दक्षिणपाणिना वसुमतीं त्वां हंतुमुक्तं वचः ॥१०॥

मी तंव एकला एक वानर। श्रीरामकटकींचें[5] किंकर। तुझें कोटि कोटि जुंझार। मजसमोर करीं उभे ॥२२॥ मशकें कोटी कोटी जुंझार। मज मारितां दशशिर। कोण राखेल निशाचर। सुरासुरा पाहूं पां॥२३॥ सदाशिव तुज रक्षिता। तुवां चोरिली श्रीरामकांता। शिव पेटला तुझ्या घाता। चोरी करितां कोण राखे ॥२४॥ ब्रह्मा तुज नित्य साहाकारी। त्याचे वंशीं तूं दुराचारी। चोरीमारी आणि परद्वारी। ब्रह्मा तुजवरी क्षोभला ॥२५॥ ब्रह्मा शिव आणि शक्र। तुज क्षोभले सुर समग्र। मज मारिता दशशिर। कोण समोर राहील ॥२६॥ मुख्य त्वां चोरिली सीता सती। जटायु मारिला विश्वासघातीं। पतिव्रतेसीं मागतां रती। प्रजापति क्षोभला ॥२७॥ मज मारिता दशवक्त्र। कुमर प्रधान सैन्य समग्र। रणीं मर्दोनि निशाचर। सीता सुंदर मग नेईन ॥२८॥

त्यामुळे इंद्रजितास कंप : ऐकोनि हनुमंताची मात। इंद्रजित चळीं कांपत। धाकें

शब्दार्थ : १. तिरस्कार-धिक्कार करून, २. उत्तर, ३. धनुर्धरांस धनुर्विद्येचा उपदेश करणारा, ४. पुष्कळ शूरांशी एकटा लढणारा, ५. रामाच्या सैन्यांतील.

बिभीषणासी सांगत । आला अपघात रावणा ॥२९॥ हनुमंताचा रणावर्त । भोगोनि इंद्रजित असे भीत । न साहवे पुच्छाचा घात । लंकानाथ केंवी वांचे ॥१३०॥ लंके आणोनि हनुमंत । कांही नव्हेचि पुरुषार्थ । आजि निमाला लंकानाथ । आला अंत राक्षसां ॥३१॥

त्याला व बिभीषणाला रावणाविषयी चिंता : इंद्रजित बिभीषण सचिंत । कैसेनि वांचेल लंकानाथ । तंव बोलिला हनुमंत। अति पुरुषार्थ रामाचा॥३२॥ रणीं मारीन रावण । करोनि सीता सोडवण । सीता घेवोनि जातां जाण। आडवा कोण येंऊ शके ॥३३॥ इतुकें करितां न लगे क्षण। परी श्रीरामें वाहिली आण[1]। स्वहस्तें मारीन रावण। मिथ्या कोण करूं शके ॥३४॥ मारोनियां दशशिरां । स्वस्थ[2] करावी वसुंधरा[3]। सुखी करावें चराचरा । श्रीरामचंद्रा निजनेम ॥३५॥ सोडावी देवांची बांधवडी[4]। तोडावी नवग्रहांची बेडी। उभारावी रामराज्याची गुढी। हे मर्यादा गाढी श्रीरामीं॥३६॥

रावणाच्या शिरावर मारुतीचा नखाग्रांनी आघात : वानरें करोनि उड्डाण । जीवें मारावा दशानन । श्रीरामप्रतिज्ञापाळण। कपि रावण न मारीच॥३७॥ रावणाचीं दाही शिरें। हनुमान खुडिता नखाग्रें। मर्यादा[5] केली श्रीरामचंद्रें । म्हणोनि वानरें राखिला ॥३८॥ श्रीराममर्यादेचें उत्तर । सर्वथा नुल्लंघीच वानर । यालागीं तो दशशिर। जीवें कपींद्र न मारीच ॥३९॥ जीवें न मारीच वानर । मरणापरीस हें दुर्धर । निर्भत्सला दशशिर । तेंही सादर अवधारा ॥१४०॥

धिक्ते रावण पौरुषं तव कुलं धिग्धिग् यशस्तेजसी ।
धिक् खड्गासुरदर्पनोदनकरं धिग्धिग् वृथा जीवनम् ।
यस्माद्राघवबाणभीतमनसा सीता परोक्षे हृता ।
तद्वैरादहमागतोस्मि हनुमान्बद्धो वधार्थे तव॥११॥

त्याचा मारुती धिक्कार करतो : जळो ते रावणा तुझी थोरी । जळो तो राजा होय भिकारी । जळो तें कर्म करणें चोरी। परनारी पतिव्रता॥४१॥ जळों तें तुझें रावणा कुळ । जळो तें रावणा तुझें शीळ । जळो तें रावणा तुझें बळ । पापी केवळ परद्वारी ॥४२॥ धिग्धिग् रावणा तुझा पुरुषार्थ । धिग्धिग् रावणा तुझा कर्तव्यार्थ । धिग्धिग् रावणा तुझें व्रत । स्वार्थ परमार्थ नाशिला ॥४३॥ धिग्धिग् रावणा तुझी राक्षसजाती। धिग्धिग् रावणा तुझी ख्याती। धिग्धिग् रावणा तुझी किर्ती। जाली अपकीर्ति तिहीं लोकीं ॥४४॥ धिग्धिग् रावणा तुझें जन्म । धिग्धिग् रावणा तुझें कर्म । धिग्धिग् रावणा तुझा धर्म। निंद्य परम तिहीं लोकीं ॥४५॥ धिग्धिग् रावणा तुझी श्रीमंती । धिग्धिग् रावणा तुझी शक्ती । धिग्धिग् तो खड्ग[6] तुझे हातीं । लोम[7] मारुतीचें न तुटेचि ॥४६॥ धिग्धिग् जीवित्व तुझें क्षितीं । धिग्धिग् रावणा तुझी शौर्यशक्ती । परोक्ष[8] चोरिली सीता सती । बाणभयें भीसी श्रीरामा ॥४७॥ चोरिली माझ्या स्वामीची नारी । त्या तुझी म्यां धरिली चोरी । चोर तो तंव प्रत्यक्ष वैरी । सहपरिवारीं मारीन ॥४८॥ देखतां सैन्य भट सुभट । तुझे मर्दीन वीसही होंट । तुझे छेदावया दशकंठ । आलों मी वाट[9] रामाचा ॥४९॥ ऐसें बोलता महाबळी । पिंजारिल्या रोमावळी । लांगूल[10] त्राहाटिले भूतळीं। वाढलें निराळीं कपिपुच्छ॥१५०॥ सर्वेचि आठवले हनुमंता । श्रीराम वधील लंकानाथा । व्यर्थ कां मी क्षोभूं आतां । केलें शांत निजकोपा ॥५१॥ एकाजनार्दना शरण। केलें लंकेशगर्वहरण । जाळील लंकाभुवन । रणकंदन अवधारा ॥५२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे सुंदरकांडे एकाकारटिकायां हनुमद्रावणगर्वहरणं नाम ब्रह्मलिखिते द्वात्रिंशत्तमोऽध्यायः ॥३२॥ ओंव्या ॥ ॥१५२॥ श्लोक ॥११॥ एवं ॥१६३॥

---

शब्दार्थ : १. शपथ, २. सुखसंपन्न, ३. पृथ्वी, ४. बंदिवास, ५. अटक, ६. तरवार, ७. लंव, केस, ८. पाठीमागें, ९. वीर, १०. शेपूट.

# अध्याय तेहेतिसावा

॥ श्रीसीतारामाभ्यां नमः ॥

## हनुमंतप्रतापवर्णन

रावणासमोर मारुती पुच्छासन मांडून बसतो त्यामुळे रावण भयभीत होतो : रावणसिंहासनासमान। घालोनियां पुच्छासन। हनुमान बैसला सावधान। दशानन लक्षोनी ॥१॥ जैसा सिंहापुढें गजाचा दर्प। कीं गरुडापुढें कांपती सर्प। तैसा देखोनि कपिप्रताप। महाकंप रावणा ॥२॥

बिभीषण व इंद्रजित रावणास सूचना करितात : जंव रावण देखे भयभीत। तंव बिभीषण इंद्रजित संयुक्त। लंकेशासी बुद्धि सांगत। कीं अवध्य हनुमंत सर्वथा॥३॥ मारूं जातां हनुमंतासी। तेणें गांजिलें महावीरांसी। पुच्छें निर्दळिलें सैन्यासी। तो कपि कोणासी नाटोपे ॥४॥ तरी बुझवावया[1] हनुमंता। श्रीरामा अर्पावी सीता। आणि शरण रिघालिया रघुनाथा। आम्हां समस्तां कल्याण ॥५॥ जें श्रीरामाचें एक वानर। केवळ तेंही पालेखाईर। तें नाटोपे आम्हां अति दुर्धर। मग आल्या रघुवीर कोणा साहे ॥६॥

ते ऐकून रावणास चिंता, पण त्यांची सूचना अमान्य : ऐसें ऐकोनि बिभीषण उत्तरा। आणि देखोनि इंद्रजितासी रणभेदरा[2]। परम चिंता दशशिरा। देखोनि वानरा चळकांप ॥७॥ तरी इंद्रजिताची बुद्धि भिन्न। आणि बिभीषण म्हणे रिघावें शरण। तरी म्यां काय करावें आपण। ऐसें रावण विचारी ॥८॥

म्हणून मारुतीचा कपटाने घात करावा अशी योजना : तरी ऐकल्या वानराभेण[3]। रिघावें श्रीरामासी शरण। तरी मज आलें उणेपण। करोनि छळण कपि मारूं ॥९॥ जैसा जटायु नाटोपतां जाण। मग म्यां मारिला करोनि छळण। तैसेंचि यासी घालोनि आण[4]। पुसोनि मरण कपि मारूं॥१०॥ जरी श्रीरामभक्त सत्यवादी। असत्य न बोलती त्रिशुद्धी[5]। तरी याचे मरणा हेचि बुद्धि। छळणानुवादीं मारावा ॥११॥

मारुतीची स्तुती करून रामाची शपथ घालून त्याचे मरण विचारतो : ऐसीं विचारोनि युक्ती। मग दाहींमुखीं लंकापती। स्तवूं आदरिला मारुती। मरणयुक्ती पुसावया ॥१२॥ तरी ऐकें कपींद्रा सावधान। तुज घालितों श्रीरामाची आणा। कीं तुज कैसेनि ये मरण। हें सत्य वचन मज सांगें ॥१३॥

आपण अमर असल्याचे मारुती सांगतो : ऐकोनि श्रीरामाची आण। हनुमान घाली लोटांगण। मज सर्वथा नाहीं मरण। हें सत्यवचन लंकेशा ॥१४॥ ऐसें परिसतां कपिवचन। गदगदां हांसे दशानन। जे जन्माआधीं गर्भी मरण। अमरपण तुज कैंचें ॥१५॥

रावणाचा अविश्वास : मग रावण वदे हनुमंता। मिथ्या वदो नको श्रीरामभक्ता। आणि तूं कां वदसी मिथ्या वार्ता। निजवृत्तांता मज सांगें ॥१६॥ जैसें जटायूस पुसोनि मरण। त्यासि मारिले करोनि छळण। तैसेंचि मजही करिसी जाण। तेणें भयें वदें मिथ्या॥१७॥ तरी मरणभय जयाचे चित्तीं। मग त्यासी कैंची श्रीरामभक्ती। देहलोभ्या श्रीरामाप्राप्ती। कदा कल्पांती असेना ॥१८॥

मारुतीचे प्रत्युत्तर व रावणाची निंदा : ऐसें परोपरी प्रबळ ज्ञान। योग्यता बोले दशानन। तरी परदाराचोरी[6] आपण। हें जाणतेपण कोण रावणा॥१९॥ तरी मरणभयें कासाविसी। आणि सीता चोरोनि स्वयें पळसी। तो तूं आम्हां शिकविसी। मरणभयासी कां भीत ॥२०॥ वर्मी

शब्दार्थ : १. समजूत घालण्यासाठी, २. लढाईंचे भय, ३. वानराच्या भीतीने, ४. शपथ, ५. खरोखर, ६. परस्त्रीचा अपहार

खोंचला लंकानाथ। मग त्यासी सांगे हनुमंत। ऐक माझा मरणार्थ। तुज यथार्थ[1] सांगेन ॥२१॥

पुच्छांचे दहन झाले तरच माझे मरण निश्चित असे मारुती सांगतो : मी असत्य वदलों नाहीं तुजसीं। जे मरण नाहीं माझे देहासी। तरी मरण आहे पुच्छासी। तें मारिसी तै मी मरें ॥२२॥ कपिपुच्छासी केलिया दहन[2]। अवश्य हनुमंतासी मरण। इंद्रजित सत्य मानी आपण। आणि सैन्य प्रधान सत्य मानिती ॥२३॥ श्रीरामआणेनें भयभीत। वदला मरणार्थ। पुच्छदाहें मरेल हनुमंत। ऐसें लंकानाथ सत्य मानी ॥२४॥

ते कसे करावे असे रावणाने विचारल्यावरून वस्त्रे गुंडाळून तेल तूप शिंपणे हा मार्ग मारुती सांगतो : मग स्वयें पुसे दशानन। तरी कोणे युक्ती पुच्छदहन। जें जाळावया लंकाभुवन। करावया छळण कपि सांगे॥२५॥ वस्त्रें तेलतुपीं भिजवोन। पुच्छ गुंडाळावें संपूर्ण। मग जाळावें अग्नि लावोन। तेणें मरण वानरासी॥२६॥ मरणवर्म[3] आलें हाता। तेणें अति उल्हास लंकानाथा। मग होय दूतांसी सांगता। वेष्टनार्था कपिपुच्छा ॥२७॥

वस्त्रांकरिता सर्व नागरिकांना नग्न केले : पुच्छ गुंडाळितां तांतडी[4]। तंव सरलीं जुनीं पानीं लुगडीं। मग गुंडिती नवी घोंगडीं। धुवट उडी उकलोनी ॥२८॥ मग दिंडे आणिली उदंडें[5]। परी तें कपिपुच्छ न गुंडे। तेणें चाटे[6] भाटे फोडिती धोंडें। करिती तोंडे महाशब्द॥२९॥ शेले खाखी बेजवटे। काळीं बेरी समसगटें। सखरें निखरें धुवटें। परी पुच्छ न वेष्टे कपीचें॥३०॥ राजगृहींची वस्त्रें। आणि नगरींची वस्त्रमात्रें। सभा नागविली समग्र। परी पुच्छ चतकोर गुंडेना॥३१॥ पोताचीं वस्त्रें घेती काढकाढूं। आणि पडदे गुंडिती फाडफाडूं। का दुसे गुंडिती उघडउघडूं। द्वंद्वीं माकडू पेटला ॥३२॥ कोणाचा मेहुणा कोणाचा पाहुणा। जांवाई आणिला दिवाळसणा। त्यांचेही करितां वस्त्राहरणा। शंखस्फुरणा ते करिती ॥३३॥ जे जे देखती वस्त्रयुक्त। त्यांतें दूत नागवित। नगरीं भोंवे पुच्छावर्त। कळकळत नरनारी ॥३४॥ स्त्रिया पळत पुरुष नागवले हळहळित। मग कां तृणें लिंग झांकित। मागें पुढें देवोनि हात। अति नग्न॥३५॥ मग राणिवसाची[7] लुगडीं। करोनि आणितीं उघडीं। लंका नागविली रोकडी। कडोविकडी कपिपुच्छें ॥३६॥ नगर नागविलें हळहळित। आणि सभा नागविली समस्त। नग्न स्त्रिया राणिवसांत। पुरविला अंत कपिपुच्छें ॥३७॥

जनानखान्यातही आक्रमण केले तरी पुच्छ मोकळेच : दुर्गसांठवण[8] निर्वडी। तेलतुपांची टांकीं गाढीं। कपिपुच्छें केलीं कोरडीं। घोंगडीं पांगडीं भिजवोनि ॥३८॥ घृत स्नेह[9] नाहीं नगराआंत। वाती लाविल्या समस्त। गडद पडले लंकेआंत। लंकानाथ धुकधुकी ॥३९॥ नगरीं तेलतुपाचा धडा[10]। आणि भोंवता वस्त्रांचा हरडा। तरी पुच्छ न गुंडे पुढां। लाविलें वेडा वानर ॥४०॥ कपिपुच्छ सभा नागविली वीरानुवीरीं। वस्त्रमात्र न मिळे नगरीं। नागव्या हळहळित नरनारीं। स्वयें नागवी तरी न गुंडे॥४१॥ पुच्छ गुंडावयाची व्युत्पत्ती। ज्याचें नगर त्याचे हातीं। लंका नागविली मारुती। लाविली ख्याती कपिपुच्छें ॥४२॥ वानर महाजगजेठी। पुच्छ गुंडितां पैं पुच्छासाठीं। शिणतां राक्षसांच्या कोटी। पुच्छ शेवटीं न गुंडे ॥४३॥ मरण रोकडें राक्षसा कैवाडें। अग्र अधिकाधिक वाढें। ऐसी ख्याती लाविली माकडें। ॥४४॥ नाहीं झगडा ना भांडण। करितां कपिपुच्छासीं वेष्टण। तृणप्राय केला रावण। ऐसी गाढी आंगवण हनुमंता॥४५॥ पुच्छ वेष्टिलें समग्र। अल्प उरलें दिसे अग्र[11]। ऐसें ऐकोनि दशशिर। पीतांबर म्हणे गुंडाळा ॥४६॥ इंद्रजित प्रधानसमवेत। रावण संतोषचित्त।

शब्दार्थ : १. खरा, २. जाळणे, ३. मरणाची खूण, ४. घाईने, ५. पुष्कळ, ६. कापडवाले, ७. अंत:पुरातील, ८. किल्ल्यातला साठा, ९. तेल, १०. तोटा. ११. टोक.

पुच्छदाहें मरें हनुमंत । पुच्छ समस्त वेष्टावें ॥४७॥ मग पीतांबरें श्वेतांबरें । आणि पट्टकुळें[1] मनोहरें। गुंडिताती क्षौमांबरें[2]। पुच्छ न भरे कपीचें॥४८॥ तंव इंद्रजित अतिशयें धाकत । जरी वांचला हनुमंत। तरी समस्तां करील घात । पुच्छदहनार्थें मारावा॥४९॥ रावण धाके मानसीं। जें पुच्छ न गुंडें पैं आम्हांसीं। तरी केंवी मारवेल हनुमंतासी। म्हणोनि उकसाबुकसीं स्फुंदत ॥५०॥

सीतेचे वस्त्र आणण्याचा विचार करताच पुच्छ गुंडाळले गेले : तंव बोलिला विद्युन्माळी[3]। जरी वानर आकळेना महाबळी । तरी उघडी करावी जनकबाळी । मग पुच्छ तत्काळीं आकळेल ॥५१॥ ऐसें ऐकतां हनुमंतें। मग सांवरिलें निजपुच्छातें । तंव दूत सांगती रावणातें। जें आम्ही पुच्छातें आकळिलें ॥५२॥ आम्ही सेवक आतुर्बळी[4]। पुच्छ आकळिलें समूळीं। म्हणोनि पिटिली सर्वी टाळी। केला समूळीं गडगर्ज ॥५३॥

पुच्छ पेटवण्यासाठी लोहाराच्या भात्याची योजना : तंव रावण सांगे अति क्रोधार्थें । अग्नी लावा रे पुच्छातें । मग आणोनि लोहकारातें । लाविले भाते अग्नीसीं॥५४॥ लंकानाथ सुखसमेळीं। पुच्छा करावया होळी । हनुमंत मारावा महाबळी। अग्नीजवळी स्वयें आला ॥५५॥ तंव अग्नीच्या पोटाआंत । कीं अपमानावा लंकानाथ। तंव तेंचि करूं पाहे हनुमंत। तो गुह्यार्थ अवधारा ॥५६॥ तयाकाळीं हनुमंते । विनविलेसें पितयातें। जे वायु सखा अग्नीतें । तरी ज्वाळा तेथें होवों नेदीं॥५७॥ ज्वाळा होवों नेदी येथें। ऐसे नमोनियां वायूतें। अपमानावया रावणाते। कपि पुच्छार्थे खवळला॥५८॥ भातें फुंकितां चौपासीं । परी स्पर्शेना पुच्छासी। राक्षस होती कासाविसी। परी अग्नि तयासी लागेना ॥५९॥

अचेतन भात्यांनी सचेतन पुच्छ कसे पेटणार? : मग रावण पुसे हनुमंतासी। अग्नि कां न लागे पुच्छासी । हनुमान म्हणे रावणासी। तूं आहेसी अति मूर्ख ॥६०॥ सदसद्विवेकज्ञान। ज्यासी नाहीं तो अति अज्ञान। तूं तंव ज्ञानगर्वी पाषाण। जे धर्मलक्षण लक्षेना ॥६१॥ भातें फुंकितां अचेतन । केंवी ज्वाळा होती सचेतन। तरी हें तुज नाहीं ज्ञान । अति अज्ञान लंकेशा ॥६२॥ तें तंव वचन मानलें लंकेशासीं। मग पाचारोनि निजवीरांसी। फुंकूं लावीलें पुच्छासीं। साक्षेपेंसी[5] सांगोनि॥६३॥ राक्षस फुंकितां चौपासीं । तंव पुच्छें दडपिलें अग्नीसी। घोर घाणी उठे घशासीं । तेणें कासाविसी राक्षसें॥६४॥ घोर घाणी अति प्रबळ । डोळां आंसुवें मुखीं लाळ । आणि ऊर्ध्वश्वासें खोकती सकळ । हलकल्लोळ मांडिला ॥६५॥ ऐसा द्वंद्वा पेटला हनुमंत। सभा जाहली धूम्राकुळित[6]। वानरें मांडिला हा अनर्थ। लंकानाथ गजबजिला ॥६६॥

तरीही ते पुच्छ पेट घेईना म्हणून मारुतीच्या सूचनेप्रमाणे रावण फुंकर घालू लागला : मग रावण पुसे हनुमंता । पुच्छ कां न जळे फुंकिता। हनुमान म्हणे लंकानाथा। ऐक आतां सांगेन ॥६७॥ पोफळ नेदितां यजमानासी। होम न करवे तयासी। तरी न फुंकितां रावणासीं। अग्नि पुच्छासी स्पर्शेना॥६८॥ जेंवी गृहस्थें न करितां ब्रह्मार्पण। द्विज न घेती आपोशन। तेंवी न फुंकितां रावण। हुताशन[7] प्रबळेना ॥६९॥ एक मुखें किती फुंकिती । दहा मुखें तुज आहेती। तुवां फुंकिलिया लंकापती । पुच्छप्रदीप्ती[8] हुताशना ॥७०॥ मग करोनि शुद्धाचमन। आणि प्रथम देवोनी घृतावदान । मग फुंकावया हुताशन। दशानन बैसला॥७१॥ हनुमंताची विवेकयुक्ती । सत्य मानलें लंकापती। पुच्छासी फुंकावया प्रदीप्ती । केली आइती[9] तें ऐका ॥७२॥ रावणाचे पोटीं कपट । कपि मारावया समसगट । येणें आवेशें दशकंठ । हव्यवाट[7] फुंकित॥७३॥ जें रावणाचे निजचित्तीं। माझेनि मुखें पुच्छप्रदीप्ती। शांत[10] जालिया मारुती।

शब्दार्थ : १. रेशमी महावस्त्रे, २. रेशमी वस्त्रे, ३. या नावाचा राक्षस, ४. महाबळवान्, ५. मोठ्या यत्राने, ६. धुराने व्याकुळ, ७. अग्नी, ८. शेपूट जाळणे,९. तयारी, १०. मेलेला.

जगीं किर्ति वाढेल ॥७४॥ तंव हनुमान म्हणे पित्या पवनासी । अग्नि फुंकितां रावणासीं। अति अपमान द्यावा त्यासी। मुख कोणासी न दावी ॥७५॥

तेव्हा एकदम भडका उडून रावणाच्या दाढी मिशा जळाल्या : तंव अति आवेशें दशानन। आक्रोशें फुंकी हुताशन । तंव भडका एकसरें होऊन । केलें दहन खांडमिशां ॥७६॥ होतां खांडमिशादहन । मुखीं पोळला दशानन। शंख करी गुद त्राहाटोन। काळें वदन लंकेशा ॥७७॥

रावणाने तोंड वर करताच पुच्छही वर झाले : जंव रावण तोंड परतें करीं । तंव हनुमान पुच्छ वरतें धरी। पहिला अपमान राजशिरीं । केली बोहरी खांडमिशां ॥७८॥

हा वृत्तांत ऐकून राम, लक्ष्मण व सुग्रीवादि सर्वांना फार हसू आले; व वानरसमूहात हनुमंताचा जयजयकार : अभिनव कपीची ख्याती। ऐकोनि हांसे श्रीरघुपती । आणि सुग्रीवासारखे जुत्पती[1]। स्वयें हांसती स्वानंदें ॥७९॥ वाचितां पत्र लक्ष्मण। तोही जाला हास्यवदन। हनुमंताचे अति विंदान। काळें वदन लंकेशा ॥८०॥ आमुचा हनुमान आतुर्बळी। जे धुरेच्या मुखा केली होळी । म्हणोनि वानरीं पिटिली टाळी । सुखसमेळीं गर्जत ॥८१॥ विजयी हनुमंत महावीर। हरिखें नाचती वानर। अवघे करिती जयजयकार । श्रीरामचंद्र स्मरोनी ॥८२॥ मग अंगदें उठोनि जाण। भेरी त्राहाटिल्या[2] निशाण। तंव सुमनें[3] वर्षती सुरगण । तेणें सुखसंपन्न श्रीराम ॥८३॥ ऐकतां सेवकाची ख्याती। स्वयें सुखावे रघुपती । धन्य धन्य तों मारुती । जे पावन कीर्ति तिहीं लोकीं ॥८४॥

मारुतीचे रामचरणी वंदन व श्रीरामस्तुती : मग सौमित्रा श्रीराम सांगत। पुढें वाची ब्रह्मलिखित । पुच्छदहनें हनुमंत। पुढे पुरुषार्थ काय केला ॥८५॥ वंदोनि श्रीरामाचे चरण। पत्र वाची लक्ष्मण । आवडीं परिसत रघुनंदन । तें सावधान अवधारा॥८६॥ श्रीरामाते अनुलक्षोनी[4]। हनुमान उभा कर जोडूनी। आपुल्या स्तुती ऐकोनी । ना श्लाघे[5] ना अभिमान ॥८७॥ मी पालेखाइरें वानर । माझी कीर्ति करिता श्रीरामचंद्र । रणीं रामनाम महाशूर। अति दुर्धर रामनाम ॥८८॥ श्रीराम हाताचा हात । श्रीराम शस्त्राचें सामर्थ्य । राम करिता राक्षसघात । रणकंदनार्थ श्रीराम॥८९॥ श्रीराम प्राणाचाही प्राण। श्रीराम बाणाचाही बाण। श्रीराम माझी आंगवण। श्रीरामीं समर्पण पैं माझें ॥९०॥ ऐसें ऐकतां हनुमंताचे बोल। श्रीरामा येती सुखाचे डोल । जे भक्तिभावार्थाची ओल । अति सखोल श्रीरामीं ॥९१॥

पुच्छाने केलेले वंदन : पुढें ब्रह्मयाचें ब्रह्मलिखित। हरिखें सौमित्र वाचित। अपमानिला लंकानाथ । सभेआंत सलज्ज ॥९२॥ प्रथमप्रारंभीं पुच्छकंदन । दाढ्यामिश्या जाळिल्या दहन[6]। सिंहासनीं काळें वदन। लज्जायमान रावण ॥९३॥ कीर्ति जाली कपकीर्ती। थोर चिंता रावणचित्तीं । पुढें काय करील मारुती। पुच्छदहनार्थी कळेना॥९४॥ छळों जातां वानरासी। छळण न चले रामभक्तासी। छळणें जाळिलें माझ्या मुखांसी। खांडमिशांसी पुच्छदाहो ॥९५॥

ते सप्तपाश तोडून मारुती मोकळा होतो : वानर उडतां रामनामेंसी । छेदिलें दुर्धर सप्त पाशांसी । तेथें द्रुमपाश रज्जुपाशांसी[7]। यमपाशासी कोण पाड ॥९६॥ काळपाश कर्मपाश। धर्मपाश ब्रह्मपाश। मायापाश मोहपाश । जन्मपाश सातवा॥९७॥ काळपाश तो आयुष्यघात। कर्मपाश तो नैश्वर्यवंत । धर्मपाश तो आश्रमगत । वेदविहितार्थ ब्रह्मपाश ॥९८॥ देहममता मोहपाश । मुख्य माया तो आशापाश । कनककांता हा जन्मपाश । ऐसे सप्त पाशांहीं जीव बद्ध ॥९९॥ सप्त पाशांची निवृत्ती। रामनामें करी मारुती। तेथें येरांची न चले युक्ती ।

शब्दार्थ : १. मल्लवीर, २. वाजविल्या, ३. फुले, ४. पाहून, ५. बढाई केली नाहीं, ६. अग्नीने, ७. दोऱ्यांचे बंधास.

शास्त्रव्युत्पत्ती शीणतां ॥१००॥ श्रीरामाचें जें नाम । तेंचि केवळ परब्रह्म । नामें निर्दळी कर्माकर्म । धर्माधर्मच्छेदक ॥१॥ अबद्ध पढतां पैं वेद। अनिवार बाधिता निषेध । आणि नाम स्मरतांचि अबद्ध । होती सुबद्ध श्रवणार्थी ॥२॥ अबद्ध मंत्राच्या प्रयुक्तीं । जापक चळलें नेणों किती। आणि अबद्ध नांवाच्या आवर्ती। जड मूढ तरती असंख्य ॥३॥ करितां क्रियाकर्मव्युत्पत्ती। जरी विधिविधानें व्यंग होती। व्यंग कर्मे नव्हे उद्धारगती। आणि हरिनामोक्ती अच्युत[1] ॥४॥

नाममहिमा, रामरक्षेचा प्रभाव : नामासीं नाहीं कर्मबंधन। नामासीं नाहीं विधिविधान। आसनीं भोजनीं शयनीं जाण। नाम पावन हरीचें॥५॥ स्वप्नीं स्मरतां रामनाम। तिन्ही अवस्था करीं भस्म। ऐसें दाटुगे[2] हरीचें नाम। नाम परब्रह्म प्रत्यक्ष॥६॥ स्वप्नींचिया स्वप्नस्थिती। कौशिका[3] रामरक्षेची प्राप्ती । जे कां दाटुगी त्रिजगतीं । उद्धरणार्थी जयाचे ॥७॥ तरी रामरक्षा ज्याचे हातीं। कळिकाळ त्यासी कांपती । यमधर्म पायां लागती । तीर्थे मागती चरणतीर्थ ॥८॥ असो रामरक्षाव्युत्पत्ती । दोनचि अक्षरें रामनामोक्ती । चहूं मुक्तीची फिटे भ्रांती । ब्रह्मप्राप्ति ठसावे॥९॥ श्रीरामस्मरणाचेनि योगें । ब्रह्मस्थिति घर रिघे। कळिकाळासी करी उभें । ऐसें नाम दाटुगें श्रीहरीचें ॥११०॥ ऐसी रामनामाची स्थिती । पूर्ण बाणली हनुमंतीं। तेणें त्याची पावन कीर्ती। त्रिजगतीं निजविजयी॥११॥ ऐसी हनुमंताची स्थिती । ब्रह्मयानें लिहिली ब्रह्मलिखितीं । पुढें कपिपुच्छप्रदीप्ती । केली ख्याती ते ऐका ॥१२॥

मारुती मेल्याचे सोंग करितो : पुच्छीं धडाडी हुताशू[4]। हनुमंतासीं अति आवेशू। जैसा खेवा[5] आलिया अमृतांशू[6]। ऐसा उल्लासू वानरीं ॥१३॥ रामनामाहींपरतें। नाहीं साधन सरतें[7]। अग्नि बांधूं न शके मातें। कृपा रघुनाथें मज केली॥१४॥ श्रीरामनामें हनुमंत। सप्तपाशबद्ध निर्मुक्त। परी तोही पुच्छें तळमळित । राक्षसां अंत करावया ॥१५॥ नेत्रीं लाविली अर्धचंद्री । आणि खरसीं[8] आणिली मुखाभीतरी । पुच्छ पसरोनि धरणीवरी । मरणानुकारी[9] कपि पडे ॥१६॥

राक्षसांचा त्यामुळे हर्ष : मग राक्षस येवोनि समस्त। जंव हालवोनि पहात। तंव कपि हालवीना पाय हात। वानरें दांत विचकिले ॥१७॥ एक उलथें पालथें करिती । एक उफराटें धरिती । तंव ते पुच्छाग्नीनें पोळती। मग पळती माघारें ॥१८॥ एक ढुंगीं घालती काठ्या। एक हाणिती फडफडाटा। ऐसा वानर मीसगाढा[10] । दांत दाढा हालवीना ॥१९॥ ऐसें मीस करोनि अति निगुतीं । हालों नेदी पातया पातीं । म्हणती निमाला मारुती । करोनि ख्याती रणमार॥१२०॥ वानरवीर जगजेठी । मारिल्या राक्षसांच्या कोटी । इंद्रजित रावण धाकें पोटीं । अवघ्यां पोटीं अति धाक ॥२१॥ जरी हा मरण न सांगता । तरी करिता अवघ्यांच्या घाता। परी तीक्ष्ण बुद्धि लंकानाथा । छळणें हनुमंता मारिलें ॥२२॥ वानर सत्यवादी पूर्ण । पाळोनि श्रीरामाची आण । सांगोनियां निजमरण। आपणा आपण मारविले ॥२३॥

वैद्यांचे मत : जंव वैद्य पाहती विचक्षण । म्हणती कपीचे हृदयीं आहे प्राण। परी तो अतिशयेसीं क्षीण। क्षणार्धे पूर्ण निमेल ॥२४॥

मारुती मेला या वार्तेने तेथे त्याला पाहाण्यासाठी प्रचंड गर्दी : हनुमान निमाला ऐकोनि । घाव[11] घातला निशाणीं[11]। इंद्रजित हरिखला मनीं। वांटी शेरणी[12] लंकेसीं॥२५॥ रावणें मारिला मारुती । लंकालोक पाहूं येतीं । राक्षसवीरांचिया पंक्ती । अमित क्षितीं दाटलिया ॥२६॥

शब्दार्थ : १. शाश्वत, २. दांडगे, ३. बुधकौशिक ऋषीला, ४. अग्नि, ५. आलिंगनाला, ६. चंद्र, ७. श्रेष्ठ, ८. फेस, ९. मरणोन्मुख होऊन, १०. ढोंग करण्यात कुशल, ११. रणभेरी वाद्यें वाजविण्यात आली, १२.खिरापत.

ती गर्दी पाहताच त्या पेटत्या शेपटीने त्यांच्यावर एकदम आक्रमण केले : मिळाली राक्षसांची मांदी । मीस घेतलें निजबुद्धी । अवघ्यां वधावया त्रिशुद्धी । पेटला द्वंद्वीं तों ऐका ॥२७॥ दाटल्या देखोनि राक्षसहारी । जळत पुच्छ घाली त्यांवरीं । तंव ते पोळती उरीं शिरीं । ऐसी आपांपरी[1] राक्षसां ॥२८॥

शेपटीने सर्वांचे रस्तेच बंद केल्यामुळे एकच त्रेधातिरपीट : पळों जातां बाहेरी। तंव जळत पुच्छ लाविलें द्वारी । अवधियां केली कोंडमारी । ऐसा निशाचरी आकांत॥२९॥ जनांच्या वस्त्रां लाविली आगीं । तेणें जळती सर्वांगीं। पुच्छ घाली एकएकाचे ढुंगीं। नेसण्या आगी लाविली ॥१३०॥ आगी लागल्या धोत्रांसी। द्विज पोळले लिंगप्रदेशी । नागवे नाचती रावणापासीं । दाविती त्यासी लिंगव्यथा ॥३१॥

हनुमंत राजद्वारी जातो : हनुमान निघाला राजद्वारीं । निशाणें त्राहाटिल्या भेरी । जळो ते रावणा तुझी थोरी । जोहारवोहारी[2] त्वा केली ॥३२॥ लंका नागविली वस्त्रासाठीं । तेलातुपा पाडिली तुटी। दिवा लावणें खुंटली गोष्टी। शेवटीं जीवा साटी[3] कपिपुच्छ ॥३३॥ आधींच वानर सबळ । आणि पुच्छ पेटविलें प्रबळ । आतां लंका जाळील तत्काळ। आणि मारील राक्षसां॥३४॥ रावणा तुझें पोटीं कपट । त्या कपटें केले तळपट । पुच्छें पेटला मर्कट। करील सपाट सर्वांचें॥३५॥

रावणाने मारुतीस विचारल्यावरून हा सर्व शेपटीचा परिणाम आहे असे त्यास सांगतो : रावण म्हणे रे हनुमंता। लंका जाळिसी कवण्या अर्था । सावध ऐकें लंकानाथा । तुज तत्वतां सांगेन॥३६॥ पुच्छासी मरण आलें निश्चित। तें मरणभयें झाडा देत। भयें लोकांमाजी लपत। तरी त्यासी मी येथ काय कीजे ॥३७॥ एकाचे चरण धरित । आणि एकाचें पोटीं गवसत। एकाचे पालवीं[4] झोंबत। जे मरणभयार्थ चुकवावया ॥३८॥ एकासीं होत शरणागत। एकाचें गळी पडत । जे विनवूनी लंकानाथ । मरणोन्मुक्त करा म्हणे॥३९॥ रावणा मीही करितों विनंती । जे जाजावोनि दहनार्थीं। पुच्छ येतें काकुळतीं । तरी मरणोन्मुक्ती[5] करीं त्यांसी ॥१४०॥ उरीं शिरीं स्वयें जाळित। त्या नांव म्हणिजे शरणागत। पुच्छें मांडिला मरणावर्त। मरणोन्मुक्त करा म्हणे॥४१॥ करावया राक्षसांचा घात। द्वंद्वा पेटला हनुमंत। देखोनि पुच्छदहनावर्त । लंकानाथ चळीं कांपे ॥४२॥

मारुतीचे सर्व लक्ष नंतर राजमंदिरांकडे वळले : रावण कपिभयें कांपत । आणि निःशंक बैसला हनुमंत। पुच्छें मांडिला आकांत । दहनावर्त[6] राक्षसां ॥४३॥ दशमुखेंसीं संमुख। हनुमान बैसला निःशंक। पुच्छे सेना आणि सैनिक । एकैक पोळविले॥४४॥ राक्षससैन्या माझारीं । बोंब सुटली एकसरीं। अग्नि पोळतां उरीं शिरीं । पुच्छ महामारीं पेटलें ॥४५॥ पुच्छ तव तें अग्निकल्लोळ । लंका वेढिली सकळ। राक्षसें करिती तळमळ। न चले बळ कपिपुच्छीं ॥४६॥ तंव हनुमान विचारी मानसीं । अग्नि लागला माझें कासेंसीं। तरी परम तृप्ती द्यावी यासी । ऐसें अति उल्लासे वानर ॥४७॥ विचारितां मूळ अनुवादु । वेदानुवाद सखे बंधु । दोहींचा पिता वायु प्रसिद्धु । परम सुहृदु आत्मत्वें ॥४८॥ अग्नि वायूचा ज्येष्ठ सुत। आणि कनिष्ठ भेटला हनुमंत । मग सुतें आलिंगिला सुत । तेणें उल्लासत स्वयें वायु ॥४९॥ ज्येष्ठ बंधु अति वरिष्ठ। भोजनीं लंकाभुवनताट । राजमंदिरी परवडी[7] श्रेष्ठ । भक्ष चोखट तें ऐका ॥१५०॥

घराघरातून पुच्छप्रवेश व त्यामुळे दाह : रावणाचा छत्रदाहो[8]। प्रथम प्राणाहुति पहा हो। माड्या गोपुरें[9] गृहसमुदावो। निजनिर्वाहो भोजनीं ॥५१॥ चंदनमंदिरें तेंचि ओदन[10]।

शब्दार्थ : १. दुर्दशा, २.आगीने राखरांगोळी, ३. भय, ४. पदराला, ५. कंटाळून, ६. जाळण्याचा सपाटा, ७. प्रकार, ८. छत्र जाळणे, ९. मनोरे, १०. भात.

सीतासोडवण। अति दारुण अनर्थ ॥५३॥ यालागीं सांक्षेपेंसी[1] रघुपतीं। बिभीषणा धरोनि हातीं। बैसविला आपणाप्रतीं। कृपामूर्ति कृपाळुवें ॥५४॥

श्रीराम ससैन्य लंकाद्वारी येताच आकाशातून त्याच्यावर पुष्पवृष्टी : राक्षसगतिनिर्बंधन। करूं धाडिले चवघे प्रधान। तेही अतिशयें सावधान। विचक्षण[2] रणयोद्धें ॥५५॥ समुद्राचे परतीरीं। फळमूळजळसंभारीं। बैसल्या वानरांच्या हारी[3]। स्वानंदेकरीं डुल्लती ॥५६॥

जयस्व शत्रूं नरदेव मेदिनीं। ससागरां पालय शाश्वतीः समाः।
इति स्म रामं नरदेवसत्कृतं शुभैर्वचोभिर्विबुधा अपूजयन् ॥११॥
ततो महान्तं कृतसेतुमीश्वरं प्रतिस्वरूपे विजयाभिनंदनः।
पुनः समुद्रोभिजगाम राघवं स दिव्यरूपाभरणो महाद्युतिः ॥१२॥

श्रीराम समुद्रपथतटीं। सुग्रीवसैन्य वानरकोटी। बैसला देखोनि जगजेठी। केली पुष्पवृष्टी सुरसिद्धीं ॥५७॥ शत्रु जाणोनि समर्थ। पृथ्वी समुद्रमेखलान्वित। प्रतिपाळावया तूं समर्थ। सुर गर्जत स्वानंदें ॥५८॥ दश सहस्त्र वर्षांआंत। निष्कंटक[4] राज्य प्राप्त। देव करावया बंदिमुक्त। तुझा पुरुषार्थ श्रीरामा ॥५९॥ बंधमुक्तता सुरवरीं। आम्ही तुझे कृतोपकारी। स्मरोनि जन्मजन्मांतरीं। जयजयकारीं गर्जतीं ॥६०॥

समुद्राचे सहकुटुंब आगमन : बांधिला देखोनि सेतुबंधु। ससैन्येंसी राम उतरला सिंधु। उतरला वानरांचा वृंदु[5]। ऐकोनि सिंधु अनुतापी ॥६१॥ पूर्वी भेटलों श्रीरघुवीरासी। युक्ती सांगितली सेतुबंधासी। नाहीं पूजिलें श्रीरामासीं। मूढता ऐसी पैं माझी ॥६२॥ मी ज्येष्ठ श्रीराम कनिष्ठ। ऐसें मानितों पापिष्ठ। तेणें अभिमानें मी दुष्ट। श्रीराम वरिष्ठ न पूजीं ॥६३॥ कनिष्ठ मानितां श्रीराममूर्तीं। महापापी मी त्रिजगती। त्या मज पापियाचीं पापयुक्तीं। सेतुसमाप्त नव्हेचि ॥६४॥ सेतु नव्हे माझे पापोक्ती। वृथा गेली नळवरदोक्ती। श्रीरामपायी पर्वत तरती। सेतुसामग्री श्रीरामें ॥६५॥ समुद्रीं पर्वत तरती स्पष्ट। तो श्रीराम मी मानीं कनिष्ठ। मजहीपरता पापिष्ठ। अतिदुष्ट आन नाहीं ॥६६॥ ऐशिया अनुतापवृत्तीं। पूजावया श्रीराममूर्तीं। घेवोनियां अलंकारसंपत्ती। श्रद्धान्वित सिंधु आला ॥६७॥ विजयलाभाच्या अनुवृत्तीं। सेतु पावला समाप्ती। परतीरीं देखिला श्रीरघुपती। सुग्रीव कपिपतीसमवेत ॥६८॥ संमुख लंका देखोनि दृष्टीं। बैसल्या वानरांच्या कोटी। रावण मारावया उठाउठीं। उल्लास पोटीं वानरां ॥६९॥ ऐसा देखोनि रघुनंदन। समुद्र घाली लोटांगण। श्रीराम वंदी सिंधुचरण। ज्येष्ठ संपूर्ण तूं आम्हां ॥७०॥ ज्येष्ठ कनिष्ठ हा अभिमान। तेणें मजमाजी पाडलें ठान[6]। श्रीरामाचें महिमान। ज्येष्ठाभिमान कळों नेदी ॥७१॥ खांबी उपजला सिंहवदन। तो काय धाकाटा प्रल्हादाहून। तेंवी ज्येष्ठ तूं रघुनंदन। धाकटेपण तुज नाहीं ॥७२॥ पायें तारिसी पाषाण। तो तरूं परमात्मा परिपूर्ण। तुज कैंचें धाकुटेपण। ज्येष्ठज्येष्ठपण श्रीरामीं ॥७३॥ तूं परब्रह्म ब्रह्मस्थिती। तूं परमात्मा परंज्योती। तूं चिदात्मा[7] चिन्मूर्ती। सगुणानुवर्ती निर्गुणत्वें ॥७४॥ तुजदेखतांहि सगुण। परी सर्वांगें निर्गुण। हेही जाण उणी खूण। श्रीराम पूर्ण परब्रह्म ॥७५॥

समागतौ लक्ष्मणवानराधिपौ बिभीषणश्चर्क्षपतिश्च जाम्बवान्।
मुदा प्रतीता हरयो वरप्रदं नेमुश्च रामं सगरस्य चात्मजम् ॥१३॥
स दिव्यरूपाभरणो महाद्युतिर्दृष्ट्वा तु रामं मुनिवेषधारिणम्।
शिरः समाधाय जयाय युंक्ष्व समीक्ष्यमाणोऽपससार सागरम् ॥१४॥
न वत्स युद्धे मुनिवेष इष्यते विभज्य कर्माणि चरंति पार्थिवा।

शब्दार्थ : १. अगत्याने, प्रयत्नाने, २. शहाणे, ३. रांगा, ४. शत्रुविरहित, ५. समुदाय, ६. नागवण, ७. ज्ञानस्वरूप

त्वं राम राजाभरणैरलंकृतो जयाय गच्छेति चकार सत्वरः ॥१५॥
तथेति चोक्त्वा वचनं महोदधेर्विसृज्य चीराणि जटा नियम्य च ।
शुभानि राजाभरणानि चादधे समुद्रहस्तात्कवचामुधानि ॥१६॥

युद्धासाठी मुनिवेषात जाण्यापेक्षा क्षत्रियाप्रमाणे जाणे उत्तम : सिंधु उतरला श्रीरघुनाथ । समुद्र सव्यें आला तेथ। त्या दोघांसी समस्त । स्वयें वंदित तें ऐका ॥७६॥ लक्ष्मण सुग्रीव जांबवंत । बिभीषणादि वानर समस्त। श्रीरामा आणि सिंधूसी वंदित। दोघे समर्थ अति श्रेष्ठ ॥७७॥ समुद्रें करोनि स्तवन। स्वयें घालोनि लोटांगण । श्रीराम वंदी सिंधुचरण । ज्येष्ठ संपूर्ण तूं आम्हां ॥७८॥ ज्येष्ठ कनिष्ठपणाची कथा । मागें वदलों मी यथार्थता । कांहीं एक विनवितों श्रीरघुनाथा । कृपावंता अवधारीं ॥७९॥ मुनिवेषे श्रीरघुनाथा । युद्ध नये ये गा रणीं करितां । ऐक मुनिवेषाची कथा । तुज तत्वतां सांगेन ॥८०॥

मुनिवेष केव्हा योग्य : मुनिवेष पाहिजे निवृत्तीं[१] । मुनिवेष पाहिजे शांती । मुनिवेष पाहिजे परमार्थी । युद्धकंदनार्थी नये कामा ॥८१॥ मागील राजे नरवीर । युद्धार्थ करिती वीरश्रृंगार । युद्धीं आलिया मुनिवेषधर । वीर जुंझार न मानिती ॥८२॥ मुनिवेषाचें लक्षण । स्वभावें केलें निरूपण । मारिले त्रिशिरा खर दूषण। मुनिवेषपण असतांचि॥८३॥ संन्यासी आणि झेंपदें[२] राऊत[३] । हा आहणां[४] होईल प्राप्त। मुनिवेषें युद्धकंदनार्थ। नव्हे शास्त्रार्थ श्रुतिमूळ ॥८४॥ निधडा वीर तूं समर्थ । कांहीं एक माझें मनोगत । श्रद्धें पूजावा श्रीरघुनाथ । अलंकारयुक्त उल्लासें ॥८५॥ सर्वालंकारभरणीं। उभा ठाकलिया रणांगणीं । आमच्या डोळ्यांची पुरेल धणी। म्हणोनि चरणीं लागला ॥८६॥ पुढती अलंकारयुक्त । कैं मी देखेन श्रीरघुनाथ । माझे पुरवावे मनोरथ । सिंधु विनवीत अति श्रद्धें ॥८७॥ सुग्रीवअंगदादि जुत्पती । सालंकृत श्रीरघुपती। पहावया उल्लास चित्तीं । आल्हादतीं स्वानंदें ॥८८॥ श्रीराम बाणल्या रत्नाभरणें । फिटेल डोळ्यांचे पारणें । उठे वल्कलाचें धरणें । बोळवणें मुनिवेषा ॥८९॥ लेइल्या अलंकार विचित्र । सुखी होतील आमचे नेत्र। तुझें देखतांचि वक्त्र[५] । सुख चिन्मात्रा कोंदाटे ॥९०॥ श्रीराम देखिल्या कृपानिधी। मनाच्या सकळ आधिव्याधी। अहंकोहंसोहंसिद्धीं । याही उपाधी हरपती ॥९१॥ चित्त होय चैतन्य । बुद्धि होय समाधान। प्रपंच होय ब्रह्मार्पण । श्रीरामदर्शनें अति श्रेष्ठ ॥९२॥

ते पाहून समुद्राला आनंद : सिंधु सुग्रीव आणि वानर । अवघे करोनि जयजयकार । भावें प्रार्थिता रामचंद्र । कृपें रघुवीर तुष्टला ॥९३॥

पूर्वश्लोकपदं-तथेत्युक्ते तु रामेण ।

सिंधुसुग्रीवप्रार्थन । ऐकोनियां रघुनंदन । स्वयें जाला सुप्रसन्न । मुनिवेषपणत्यागार्थ ॥९४॥ फेडोनियां वल्कलांबर। श्रीराम वेष्टी पीतांबर । जो कां अत्यंत मनोहर । स्वयें समुद्रें आणिला ॥९५॥ श्रीरामकासेसीं लागोन । वीज विसरली अस्तमान । तैसा पीतांबर जाण । दैदीप्यमान तेजस्वी ॥९६॥ स्वयें श्रीराम आपण। सुमनीं[६] जटा आच्छादोन। त्यावरी समुद्रें आपण। मुकुट संपूर्ण बाणला ॥९७॥ अनर्घ्यरत्नीं रत्नघन । मस्तकीं मुकुट दैदीप्यमान । तेणें शोभला श्रीरघुनंदन । जननयनसुखकारी ॥९८॥ निजतेजें घवघवोनि[७]। मुकुट माथां अनर्घ्यमणी। श्रीराम शिरोमणींचा शिरोमणी । तोही आभरणीं[८] शोभत ॥९९॥ कुंडलें शोभती मकराकार । लौकिक बाह्य विचार । तो मुख्य मूळीं निर्विकार। श्रवणें विकार निर्दाळी ॥१००॥ उभय बाहूबाहुवटें। वरी कंकणें उद्भटें । मुक्ताफळें श्रेष्ठश्रेष्ठें । शोभती मनगटें सुंदर ॥१॥ मनगटें बाणली सुंदरें । कंठीं बाणली चौसरें । श्रीरामा आवडे एकसरें । गुह्य समुद्रें नेणिजे ॥२॥

शब्दार्थ : १. मोक्षाचे कायी, २. बलाढ्य, ३. स्वार, ४. म्हण, ५. तोंड, ६. पुष्पांनी, ७. शोभोन, ८. अलंकारांनी.

गुणातीत परिपाक । तेंचि श्रीरामा हृदयीं पदक । पाहतां जीवशिवां पडलें टक । अलोलिक निजसेवा ॥३॥ कटीं बाणली कटिमेखळा । क्षुद्रघंटिकाज्वाळमाळा । कंठीं अनर्घ्य रत्नमाळा । मुक्ताफळांसमयोगें ॥४॥ वाकींआंदुवांचा मेळा । ज्यांचा धाक कळिकाळा । वैरी कांपती चळचळां । तो चरणकमळा तोडरू ॥५॥ श्रीरामाचा मुखमृगांक[१] । परिपूर्णत्वें निष्कळंक । त्याचे उपमें नये शशांक[२] । तो सकळंक क्षयरोगी ॥६॥ मुकुट कुंडलें मेखळा । कांसें कसिला सोनसळा । घवघवीत घनसांवळा । देखोनि डोळां निवाले ॥७॥ टिळक रेखिला पिवळा । आपाद कंठी रत्नमाळा । घवघवीत घनसांवळा । देखोनि डोळां निवाले ॥८॥ कंठीं कौस्तुभ तेजाळा। कटिसूत्रीं किंकिणीजाळमाळा । ऐसा घवघवीत घनसांवळा । देखोनि डोळा निवाले ॥९॥ मुक्तीचा दुकाळ मुक्ताफळां। ते पडली श्रीरामाच्या गळां। मुक्ती देवोनि मुक्ताफळा। घनसांवळा शोभत॥११०॥ अम्लान[३] नवपंकजांची[४] माळा। श्रीरामा तुळसीमाळ गळां । तोडर गर्जे रामपदकमळा । घनसांवळा घवघवीत ॥११॥ हृदयीं पदक अति गंभीर । बाहीं बाहुवटें मनोहर । ऐसा देखोनि श्रीरामचंद्र । नाचती नेत्र सुखोर्मी ॥१२॥ चरणकमळीं संत भ्रमर । वांकीअंदुबांचा गजर । ऐसा देखोनि श्रीरामचंद्र । नाचती नेत्र सुखोर्मी ॥१३॥ रूपरेखा अति लावण्य । ऐसा देखोनि रघुनंदन । ठाणमाण लावण्यघन। नाचती नयन सुखोर्मी ॥१४॥ मांडोनि माहेश्वरी ठाण । करीं धरोनि धनुष्यबाण । ऐसा देखोनि रघुनंदन । नाचती नयन सुखोर्मी॥१५॥ वीरकंकणीं झणत्कार । करमुद्रिका दशावतार। ऐसा देखोनि रामचंद्र । नाचती नेत्र सुखोर्मी ॥१६॥ नेत्रा निवाले निर्विकारें । बुद्धि दोंदली सन्मात्रें । हृदय आनंदलें समग्र। चिदचिन्मात्र श्रीराम ॥१७॥ अहंकोहंसोहंपण । सांडोनि अभिमान आपण । वंदितां श्रीरामाचें चरण। स्वानंदें पूर्ण निवाले ॥१८॥ वीर शृंगार श्रीराममूर्ती। देखतांचि इंद्रियवृत्ती। परमानंदे नित्य तृप्ती । सरित्पत्ति तटस्थ ॥१९॥ टक पडिले समुद्रा । टक पडिले वानरा। टक पडिलें सुरनरां । श्रीरामचंद्रा देखोनि॥१२०॥

समुद्राने श्रीरामांवरून रत्ने ओवाळिली : वाहों विसरलें जीवन । जावों विसरला पवन । रवि विसरला दिनमान । श्रीरघुनंदन देखोनी ॥२१॥

ते पाहून समुद्राला आनंद : देखतां श्रीरामाची मूर्ती। समुद्र सुखावला चित्तीं । सुग्रीव सुखावला कपिपती। सुखी जुत्पती वानर ॥२२॥ सुखावोनि वानर । अवघे करिती जयजयकार। देतां रामनामें भुभुःकार । नादें अंबर कोंदलें ॥२३॥ समुद्रें श्रीराम धरोनि हातीं। नेला वरुणालयाप्रती। वरुणासी नमस्कारी रघुपती। वृद्ध मूर्ति देखोनी ॥२४॥ वरुण घाली लोटांगण । श्रीराम अवतारी ब्रह्म पूर्ण । शीघ्र करीं लंकागमन । विजयी पूर्ण तूं होसी ॥२५॥ जैसा शृंगारिला श्रीरामचंद्र। तैसाचि सखा सौमित्र[५]। दोघे महावीर शूर। जेंवी रविचंद्र आकाशीं ॥२६॥ समुद्रें आणोनियां जाण । रत्नांजळी भरोनि पूर्ण । श्रीरामासी ओंवाळून । सांडिली आपण स्वानंदें ॥२७॥ सुग्रीव येवोनि उठाउठीं । ओंवाळोनि धनकोटी । वाटूं जातां समुद्रतटीं । मागता दृष्टीं दिसेना ॥२८॥

रत्ने वानरांनी उधळली ती रावणाच्या सभेत पडली : श्रीरामाचियें संगतीं । लोलुपता[६] निमाली निश्चितीं । मागण्याची समूळ शंती । स्वानंदें तृप्ती सर्वांसी ॥२९॥ मागता न देखोनि दृष्टीं । वानरीं उडोनि उठाउठीं । रावणाचे सभानिकटीं । केली वृष्टी धनरत्नीं ॥१३०॥ कायसी[७] धनरत्नांचीं वृष्टी । पाहूं धाडिल्या राक्षसकोटी । घेवोनि वानरसेनाकोटी । आला जगजेठी श्रीराम ॥३१॥

तेव्हा चौकशी केली त्यावेळी श्रीरामांचे वानर सैन्य आल्याचे कळले : आला ऐकोनि श्रीरामासी।

---

शब्दार्थ : १. मुखचद्रमा, २. चंद्र, ३. न कोमेजणाऱ्या, ४. नवीन कमळांची, ५. लक्ष्मण, ६. लोभ, ७. कां?, कशामुळे

दशानन चिंता मानसीं । पाहों धाडिलें प्रधानांसी । आणि लंकेसीं आकांत ।।१३२।। मागें पळावया नाहीं वाडी। पुढें आली वानरधाडी। रावणाची बुद्धि कुडी। बांदवडी स्त्रीपुत्रां ।।१३३।। एकाजनार्दना शरण। हदादिलें[1] लंकाभुवन। श्रीराम येवोनि आपण। करील कंदन राक्षसां ।।१३४।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे सुंदरकांडे एकाकारटीकाया श्रीराम-सैन्यसिंधुपरपारप्रवेशो नाम एकचत्वारिंशत्तमोऽध्यायः ।।४१।। ओंव्या ।।१३४।। श्लोक ।।१६।। एवं ।।१५०।।

## अध्याय बेचाळिसावा

।। श्रीरामचंद्राय नमः ।।

### अतिकायाकडून रावणाची कानउघाडणी

आला ऐकोनि रघुनंदन । भयें भयभीत दशानन। प्रधान सेना अति उद्विग्न । लंकाजन सकंपित ।।१।। चाकाटला रावण। तंव भेरी लावोनि निशाण। स्वयें आला रघुनंदन। वानरसैन्यसंभारीं।।२।।

ततस्तु तूर्यघोषेण भेरीशब्देन नादिता । राघवस्यागमत्सेना नानाप्रहरणान्विता ।।१।।
समागतां तु तां सेनां दृष्ट्वा राजा दशाननः । मुहूर्तं ध्यानमास्थाय सचिवान्वाक्यमब्रवीत ।।२।।
वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठाः शृणुध्वं मम राक्षसाः । न ज्ञातं भवतामद्य लंकां प्राप्तः स राघवः ।।३।।
सहितः सर्वसैन्येन वानराणां सलक्ष्मणः । निवारणं नैव कृतं वानराणां रणाजिरे ।।४।।
गृहीत्वा वानरान्सर्वान्सेतुर्बद्धो महोदधौ । भवंतो विषयासक्ताः प्रसंगे शयनं गताः ।।५।।

लंकेत सर्वत्र हाहाकार व रावणावर दोषारोप : शंख भेरी टाळ घोळ। काहळा वाजती चिनकाहळ । ढोल पटह मांदळ । ध्वनि आगला बुरुंगें ।।३।। धडैधडै विख्यात वाही। निशाणां लागली एक घाई। विराणीं[2] वाजती दोहीं बाहीं । गिडबिड ठायीं गर्जती ।।४।। ऐसा वाजंत्रांचा गजर । घेवोनि कपिकुळसंभार। लंके आला श्रीरघुवीर । केला भुभुःकार वानरीं ।।५।। देखोनि श्रीरामाचा यावा[3] । कल्पांत रावणाच्या जीवा । कायसा प्रधानाचा केवा[4] । दुःखकालोवा[5] राक्षसां ।।६।। श्रीराम आला वानरभारीं । अति आकांत लंकापुरीं । शंख करिती घरोघरीं । नर नारी कळकळिती ।।७।। वानरदळ देखोनि गाढें । एक चाले एकापुढें । एक एकामागें दडे । कोणीकडे दडावें ।।८।। पळावया वाट नाही पुढें । वानरीं बळकाविलें हुडे[6] । रावणाचें कर्म कुडें । मरण रोकडें सर्वांसीं ।।९।। रावणअपराधासाठीं। मरती राक्षसांच्या कोटी । घरोघरीं बोंब उठी । वानर दृष्टीं देखोनी ।।१०।।

रावणाने प्रधानांचा केलेला धिक्कार व उपहास : पापबुद्धि लंकानाथा । चोरोनि श्रीरामाची कांता । करविलें लंकेच्या घाता । उपाव आतां चालेना ।।११।। पूर्वी सूचवी बिभीषण। सीता देवोनि रिघावें शरण। पापी नायके आपण। आलें मरण राक्षसां ।।१२।। आला देखोनि रघुनंदन। अति क्षोभला दशानन। पाचारोनियां प्रधान। बोले आपण तयांसी ।।१३।। घेवोनियां वानरसैन्य। लंके आला रघुनंदन । तरी तुम्हांसी नाहीं ज्ञान । मदें मैथुनविषयांध ।।१४।। समुद्रीं तारोनि पाषाण । सेतु बांधिला संपूर्ण । तरी तुम्हांस नाहीं ज्ञान । मदे मैथुनें विषयांध ।।१५।। श्रीराम येवोनि सहपरिवारीं। वानर ठाकिले उरावरी। तुम्ही सुषुप्तींत स्त्रियाजानूंवरीं। विषयसंचारीं विषयांध ।।१६।। सहलक्ष्मण वानरभारीं। श्रीराम आला लंकेवरी। तुम्हीं विषयांध

---

शब्दार्थ : १. हडबडले, २. वाद्यविशेष, ३. आगमन, ४. पाड, गणना, ५. दुःखाचा कड, ६. बुरूज.

निदसुरी । आदळे वैरी तुम्ही नेणां ॥१७॥ मद्यमैथुनीं तत्पर । नाहीं जवळी हेर चार[1] । वैरियें घेतलें घर। तुम्ही पामर तें नेणां ॥१८॥ पंचविषय पंचभूत। तुम्हांस लागलें निश्चित। लंके आला श्रीरघुनाथ। तुम्हीं सभ्रांत नेणाचि ॥१९॥ पूर्वल तुमचा बडिवार[2]। म्हणा बापुडे ते वानर। वनचर पालेखाइर। आम्हांसमोर केंवी येती ॥२०॥ तेचि वानर महावीर। सेतु बांधोनि समग्र। लंके आले अति दुर्धर । देती भुभु:कार श्रीरामनामें ॥२१॥ काळकृतांत दशानन । त्यांतें करोनि तृणासमान। सेतु बांधोनि वानरगण। युद्ध दारूण करूं आले ॥२२॥ उपेक्षोनि वीर समस्त । मजचि लक्षोनि निश्चित । वानर युद्धासी उद्यत। अति समर्थ रणयोद्धे ॥२३॥ रोकडें मांडलें असे रण। तुम्हीं करितां कपिहेळण[3]। अवश्य तुमचा घेतील प्राण । कपि विचक्षण रणयोद्धे ॥२४॥ तुमचिया असावधानता[4]। लंके येणें श्रीरघुनाथा। वानरीं सेतुबंधनता । नेणों सर्वथा अति गर्वे ॥२५॥

बध्यमानं तथा सेतूं वानरैश्च निशाचरा: । द्रष्टुं चारा न प्रहिता मंत्रपक्षो मदोद्धत: ॥६॥
हितं मंत्रयते राज्ञ: स मंत्रीति निगद्यते । मंत्रिभि: सह कार्यार्थ: सिद्धिं गचछत्यसंशयम् ॥७॥
एवं भवद्भिर्विश्रंभाद्वंचितोहं निशाचरा: । अंको ममायं सुमहान्यदि कार्यं विनंक्ष्यति ॥८॥

बिभीषणाच्या सूचनेची आठवण : वानरवीर स्वयें समस्त । कडकडाटें सेतु बांधित । तें तुम्हीं नेणा गर्वोन्मत्त । मद्याभिभूत[5] स्त्रीकामी ॥२६॥ धनोन्मत्त मदोन्मत्त। स्त्रीकामें कामोन्मत्त । गर्वोन्मत्त बळोन्मत्त । पंचोन्मत्त तुम्ही सर्व ॥२७॥ पंचोन्मत्त उन्मत्त पूर्ण । चोर हेर पाठविले कोण। माझ्या कार्याची आठवण। तुम्हांसी विस्मरण उन्मादें ॥२८॥ सर्वदा रायाचें हित विचारी । यालागीं त्यासी म्हणिजे मंत्री । तें कार्य नाहीं तुम्हांमाझारी । विषयसंचारी विषयाचे ॥२९॥ सकळ कार्य प्रधानाहातीं। ऐसी अनादि राजनीती। तुम्ही माझे विश्वासघाती । ठकिलें निश्चितीं निजस्वार्था ॥३०॥ तुम्हांस मज विश्वासता । तुम्ही पेटलेति माझ्या घाता । लंके आणिलें श्रीरघुनाथा। कुळक्षयार्था समूळीं ॥३१॥ बिभीषण माझा धर्ममूर्ती । तो बोलिला सत्य युक्ती । प्रधान तुझे विश्वासघाती। हेही प्रतीति मज आली ॥३२॥

इंद्रजिताचे आश्वासन : उन्मादें मदोन्मत्त प्रधान । अविश्वासीं यांचें वदन । ऐसें बोलिला बिभीषण। प्रत्यक्ष प्रमाण मज आलें॥३३॥ माझा बिभीषण येथें असता । तो सेतुचि बांधों न देता। येवों न देता रघुनाथा। माझ्या निजहिता कृतोपकारी ॥३४॥ तुमच्या वचना विश्वासोन। सखा दवडिला बिभीषण। आंगीं आदळला[7] रघुनंदन । कपटी प्रधान मज माझें ॥३५॥

रावणेनैवमुक्तास्ते राक्षसा व्रीडिता भवन् । व्रीडितानां ततस्तेषां मेघनादो ह्याभाषत ॥९॥
किमर्थं तप्यसे तात राघवो लक्ष्मणस्तथा । किं करिष्यंति मनुजा वानरा वनचारिण: ॥१०॥
तौ वा मनुष्यमात्रौ तु भ्रातरौ रामलक्ष्मणौ । व्यतीते संभ्रमे राजन्नहं हन्मि प्लवंगमान् ॥११॥

लंके आला रघुनंदन । सकोप रावणाचे वदन। ऐकोनि सेना प्रधान। लज्जायमान जाहले ॥३६॥ गजरें आला रघुनंदन । आंगीं आदळलें विघ्न । लज्जायुक्त प्रधान। कंपायमान भयभीत ॥३७॥ आला देखोनि रघुनाथ। रावण कोपें जाला कृतांत । प्रधानराक्षसेंसीं आकांत । प्राणावर्त सर्वांसी ॥३८॥ अधोवदनें अवघे स्तब्ध । कांहीं न बोलती शब्द। तया काळीं मेघनाद । करी अनुवाद जनकासी ॥३९॥ आला देखोनि श्रीरघुनाथ । तूं कां व्यर्थ भीसी ताता । कायसी रामलक्ष्मणांची कथा। कपि समस्त कोण गणी ॥४०॥ इंद्र आणिला बांधोन । बंदीं घातले सुरगण । रामलक्ष्मण ते कोण। वानरगण कोण गणी ॥४१॥ वानर स्वयें पालेखाइर। रामलक्ष्मण मनुष्यमात्र। ते तंव आमचा नित्य आहार। भय दुर्धर तुज कैंचें ॥४२॥

शब्दार्थ : १. जासूद, २. मोठेपणा, ३. वानरांची निंदा, ४. गैरसावधपणाने, ५. दारू पिऊन गुंग झालेले, ६. दूत, ७. येऊन ठेपला.

स्वामीनें राहावें सुखें स्वस्थ । तूंही जाणसी माझा पुरुषार्थ । जे जे आले आहेत येथ । ते मी समस्त मारीन ॥४३॥ विकट बाण वीरश्रेणी[1] । रामलक्ष्मण पाहीन रणीं । अंगद सुग्रीव राजे दोनी । रणीं शोधोनी मारीन ॥४४॥ ज्याचे पवाडे[2] अद्भुत । कंदन केलें लंकेआंत । तो मी मारीन हनुमंत । जांबवंत दूसरा ॥४५॥ नळ नीळ गंधमादन । तरस तरळ पनस सुषेण । एकैक वानर ससैन्य । निर्दळीन बाणाग्रें ॥४६॥ माझ्या बाणांची झडाडी । रामलक्ष्मणां प्रेतपरवडी[3] । मारीन वानरांच्या कोडी । तीं बापुडीं मर्कटें ॥४७॥

मेघनादवचः श्रुत्वा प्रहस्तो वाक्यमब्रवीत् । मुशलायोधिनो ह्यग्रे कः स्थास्यति रणाजिरे ॥१२॥
मुशलं भ्रममाणं तु रावण त्वमवेक्ष्यथाः । अहमेको वधिष्यामि तव शत्रुं दशानन ॥१३॥
सुखी भव महाराज यथेष्टं कुरु चेष्टितम् ॥१४॥

प्रहस्ताचे भाषण : ऐकोनि इंद्रजिताचें वचन । प्रहस्त बोले अति गर्जोन । राया तुझें शत्रुदमन[4] । मी करीन एकला ॥४८॥ माझ्या मुसळघायापुढें । रामलक्ष्मण बापुडे । कायसे वानर बळियाडे । रणी रोकडें मारीन ॥४९॥ मुसळ साधन चक्राकार । अष्टांगी विषम मार । प्रहस्त दावी महावीर । दशशिर अनुलक्षी ॥५०॥ राया तुझा शत्रुसंभार । म्या मारिला मानीं साचार । सेवोनि पद्मिनीकामसेजार । भोगीं विचित्र स्वयें भोग ॥५१॥

एवमुक्तः प्रहस्तेन धूम्राक्षो वाक्यमब्रवीत् । लंकामूले स्थिताः सूक्ष्मीभूत्वा सद्यो निशाचराः ॥१५॥
गच्छामस्त्वरिताः सर्वे तत्र तद्वानरान्बहून् । सुखसुप्तान्हनिष्याम एतद्धि मम रोचते ॥१६॥

तसेच धूम्राक्षाची दर्पोक्ती : ऐकोनि प्रहस्तनव्हाळी । धूम्राक्ष गर्जोनि वचन बोली । वानरसेना लंकामूळीं । आतुर्बळीं आदळली ॥५२॥ सन्नद्ध आम्ही अवघे जण । रात्रीं जावोनि आपण । निजले असतांचि जाण । वानरगण निर्दळूं ॥५३॥ सौमित्र आणि रघुपती । सुग्रीव अंगदादि जुत्पत्ती । जावोनि मारूं रातोरातीं । रणसमाप्ती शत्रूसी ॥५४॥ ऐसी करोनियां ख्याती । यश देऊं लंकापती । हेंचि आवडे माझे चित्तीं । वीरांप्रती सांगत ॥५५॥ ऐसी धूम्राक्षाचीं उत्तरें । निर्भत्सिलीं महोदरें । श्रीरामें नित्य रक्षिलीं वानरें । सहपरिवारें सुग्रीवें ॥५६॥

माहोदरोथ निर्भर्त्स्य धूम्राक्षं वाक्यमब्रवीत् । वानराणां बलं वीरैः समंतात्परिरक्षितम् ॥१७॥
न तत्र गमनं युक्तं पुरा बुद्धिर्विधीयताम् ॥१८॥

महोदर धूम्राक्षाचा धिक्कार करितो : निजल्या वानरां करावा घात । हा कोण तुझा पुरुषार्थ । धूम्राक्षाची सभेआंत । निर्भर्त्सित महोदर ॥५७॥ श्रीराम नित्य सावधान । स्वयें रणी वानरगण । सुग्रीव राजा आपण । करी रक्षण अहोरात्र ॥५८॥ श्रीराम नित्य सावधान । छळितां मारीच पावला मरण । शूर्पणखा आपण । करितां छळण विटंबिली ॥५९॥ तेथें वानरांच्या निजघातीं । तुम्हांसीं जातां रातोरातीं । श्रीरामबाणाच्या संपातीं । मराल निश्चितीं एकैक ॥६०॥ श्रीराम नित्य देखणा जाण । परी त्याचिया भात्याचे बाण । आंधारीं देखणे पूर्ण । घेती प्राण गिवसगिवसूं[5] ॥६१॥ देखोनि श्रीरामदर्भशिखा । पाठी लागोन काका । हिंडवोनि तिहीं लोकां । शेखीं वामनेत्र देखा घेतला ॥६२॥ ऐसिया श्रीरामापुढें । घाला घालणें केंवी घडे । तुम्ही राक्षस उन्मत्त वेडे । मराल रोकडे श्रीरामबाणीं ॥६३॥ तुम्ही ऐका अवघे सावध । वानर आले अति उन्नद्ध । दुर्ग करा सन्नद्धबद्ध । दुर्गबळें युद्ध करूं त्यांसी ॥६४॥ हुडे अटाळें पौळी पागरें । ठायीं ठायी जडा यंत्रें । सन्नद्धबद्ध वीरानुवीरें । दुर्गद्वारें रक्षावीं ॥६५॥ दुर्धर या वानराचें बळा । कपाटीं घाला रे अर्गळा[6] । दृढ देखोनियां सांखळा । दळ समेळ संरक्षा ॥६६॥

शब्दार्थ : १. शूरांचा समुदाय, २. स्तुती कीर्ती, ३. मरणप्राती, ४. शत्रूचा प्रतिबंध, ५. शोधशोधून, ६. खिळी.

अतिकायाची स्पष्टोक्ती : ऐकोनि महोदराची मात। अतिकाय गदगदां हांसत। जो जो बोलिला पुरुषार्थ । तो तो व्यर्थ दिसताहे ।।६७।। वानरांच्या उड्डाणापुढें । लंकादुर्ग तें बापुडें । अर्गळा सांखळा कवाडें। कोणीकडे आंवरती ।।६८।। त्रिकूटाच्या शिखरांवरी। उडों शकिन्नल वानरों । तेथें तुमच्या दुर्गांची थोरी । तृणावारी गणीना ।।६९।। स्वहित सांगतां बिभीषण । त्यासी केले नगरनिर्यापण[1] । मजही बोलतां स्वधर्म पूर्ण । अवघे जण क्षोभाल ।।७०।। क्षमा कराल अवघे जण । तरी मी यथार्थ सांगेन। सत्यसंकल्प रघुनंदन वृथा वल्गन[2] प्रधानां ।।७१।। इंद्रजित माझा ज्येष्ठ बंधू । पुरुषार्थ बोलतो असंबद्धू । करितां कपीसीं युद्धसंबंधू । तेणे सुबद्धू गांजिला ।।७२।। तोचि इंद्रजित आतां । लाजेना वाटव[3] बोलता । मिथ्या बोले तयादेखतां। अतिपुरुषार्थी वल्गोनी।।७३।। मारीन लक्ष्मण रघुनाथ। सुग्रीव अंगद जांबवंत । मारीन म्हणतां हनुमंत। सभेआंत लाजेना ।।७४।। तैसाचि प्रहस्त प्रधान । जंबुमाळीं मारिल्या जाण । पुत्रशोकें करी शंखस्फुरण । हनुमंती रण न करीचि ।।७५।। हनुमंतेंसी रण न करवे । तो प्रहस्त मुसळेंसीं धांवे। सुग्रीवादि कपि आघवे । मारीन लावणें हे मृषा जल्प ।।७६।। धूम्राक्ष महाबळवंत । निजल्या वानर समस्त । यांचा म्हणे मी करीन घात । थोर पुरुषार्थ हा त्याचा ।।७७।। ऐसे मिथ्यावादी प्रधान। वृथा मिरविती आंगवण। त्यांसी विश्वासतां रावण । दुःख दारुण पावेल ।।७८।।

एतस्मिन्नतरे वीरः प्रगृह्य विपुलं भुजम् । अतिकायो महावीर्यो रावणं वाक्यमब्रवीत् ।।१९।।
रक्षितव्याः प्रजा राज्ञा रक्षितव्या द्विजातयः । दस्यवश्च निहंतव्याः परिपाल्याश्च साधवः ।।२०।।
रामो विनयसंपन्नस्तस्य भार्या त्वया हृता । तेनैव गर्विता यूयं विनाशाय कुलस्यं च ।।२१।।
तन्मह्यं रोचते बुद्ध्या सीता रामाया दीयताम् । एवमुक्त्वातिकायस्तु तूष्णीं भूतो बूभव ह ।।२२।।

त्याची रावणाला विनंती : तेचि समयीं वीराधि राज । उभवोनियां दक्षिण भुज । अतिकाय स्वधर्म गर्जे । अवधारिजे राजेंद्रा ।।७९।। रायें रक्षावे गोब्राह्मण । निर्भय प्रजांसी संरक्षण। करावें दुष्टांचें निर्दळण। परिपाळण साधूंचें ।।८०।। ऐशिया स्वधर्मनीती। ज्या रायांच्या वर्तती स्थिती। ते राजे सदा सुखी असती। धरा भोगिती निर्भयें ।।८१।। हित सांगतां बिभीषण। लत्ताघातें नगरनिर्यापण । मजही बोलतां स्वधर्म पूर्ण । दुष्ट दुर्जन न म्हणावें ।।८२।। सुबुद्धि बिभीषण पवित्रु । दवडिला तुम्ही करोनि शत्रु । तूं पिता मी निजपुत्रु। धर्मविचारु अवधारीं ।।८३।। जिकडे नित्य पापाचें आचरण । अकीर्ति अपेश अकल्याण। अति निंद्यत्वें पावे मरण । सत्य जाण लंकेशा ।।८४।। जेथें नित्य धर्माचरण। यश कीर्ति कृतकल्याण। त्रैलोक्यीं विजयी होय आपण । सत्य जाण लंकेशा ।।८५।। श्रीराम धर्मात्मा अति शुद्धू। तुझा न करितां अपराधु। तुवां कां चोरिली त्याची वधू । पापी सुबुद्धू जालासी।।८६।। सीता पतिव्रता संपूर्ण । करितां परदारहरण । खतेला[4] पापीं तूं पूर्ण। कुळनिर्दळण अति पापें ।।८७।। सीता आणिता लंकेआंत । तैंहूनि उठिले अति उत्पात। अखयादि वीर समस्त। केला अति घात हनुमंतें ।।८८।। परदारपापसंकटीं । वानरांसी देवोनि पाठी। इंद्रजित पळे उठाउठीं। सैन्यकोटी मारवूनी ।।८९।। परदारादिहरण । तें पाप अति दारुण। वानरें गांजिला रावण। लंकाभुवन जाळोनी ।।९०।। ऐसी देखतां प्रतीति[5]। वृथा माना बलोन्मत्ती । गर्वे निमसील[6] लंकापती। सैन्यसंपत्ती समूळ ।।९१।। साष्टांग नमन रावणासी । दुसरें नमन इंद्रजितासी । तिसरें नमन प्रधानांसी । निजहितासी अवधारा ।।९२।।

शब्दार्थ : १. नगराबाहेर घालविणे, २. बडबड, ३. मोठेपणा, ४. निंद्य, ५. अनुभव, ६. मरशील

माझे आवडीची कथा । श्रीरामासी अर्पोनि सीता । वांचवावें लंकानाथा । आणि समस्तां राक्षसां ॥९३॥ श्रीरामसी रिघोनि शरण । सीता अर्पितां आपण । अक्षय कुमर आणि रावण । सत्य वचन हें माझें ॥९४॥ सैन्य सेना आणि प्रधान । अक्षय[१] राक्षसलंकाभुवन । भुक्तिमुक्ति अक्षय पूर्ण । त्रिसत्य वचन हें माझें ॥९५॥ सीता अर्पोनि आपण । श्रीराम रिघतां शरण। स्वप्नीं नाहीं जन्ममरण । परम कल्याण अति कीर्ति ॥८९६॥ ऐसें स्वहिताचे उत्तर । स्वयें न मानी दशशिर । प्रधान न मानिती कुमर । मरणातुर उन्मादें ॥९७॥ मद्योन्मत्त धनोन्मत्त । बळोन्मत्त राज्योन्मत्त । अति गर्वे गर्वोन्मत्त । पंचोन्मत्त मरणार्थी ॥९८॥ पतंग दीपातें झडपिती । जळोनि स्नेही बुडती । तरी मागील झडप देती। मरणोन्मत्तीं उन्मत्त ॥९९॥ अभिलाषितां सीता सती। विरोधितां श्रीरघुपती। रावणा मरसी गर्वोन्मत्तीं । सैन्यसंपत्तीसमवेत ॥१००॥ रावणा देखतां लंकेआंत । कपीनें केला अति आकांत । तेंही न माना तुम्ही समस्त। गर्वोन्मत्त मरणार्थी ॥१॥ भीड सांडोनि बोलिलों कठिण । यालागीं माझें लोटांगण । क्षमा करावें संपूर्ण । बाळभाषण हें माझें ॥२॥ स्वहित नायके दशानन । अतिकायासी आलें रुदन । अश्रुपूर्ण जाले नयन । धरोनि मौन राहिला ॥३॥ दु:ख पावेल निजमाता । ऐशिया बोलाची कथा । येवों नेदीच वाक्पथा[२]। अैति मौनता[३] राहिला ॥४॥

त्याचा रावणादिकांवर झालेला परिणाम : ऐकोनि अतिकायाचें वचन। जीवीं खोंचला[४] दशानन । इंद्रजित आणि खोंचले प्रधान । प्रतिवचन न देती ॥५॥

सुंदरकांड संपूर्ण झाले : एकाजनार्दना शरण । श्रोत्या वक्त्या पडलें मौन । सुंदरकांड जालें संपूर्ण । श्रीजनार्दननिजकृपा ॥६॥ घेवोनि वाळीचें बळबंड । सुग्रीवा राज्य दिधलें प्रचंड । कपिसैन्य आणोनि उदंड[५]। सुंदरकांड संपविलें ॥७॥ सीताशुद्धीचियें चाडां । वानरें वनीं देवोनि झगडा । हेमविवरीं घेवोनि झाडा। सुंदरकांडा संपविलें ॥८॥ देवोनि समुद्रीं गडाडा । वानरी प्राण देतां पुढां । संपाती भेटोनि रोकडा । सुंदरकांडा संपविलें ॥९॥ सीता शोधोनि धडफुडां। समुद्र उल्लंघोनि हनुमान गाढा। करोनि अशोकवना उपाडा। सुंदरकांडा संपविलें ॥१०॥ मिष करोनि वनउपाडा । वनीं राक्षस करोनि रगडा । इंद्रजित गांजोनि गाढा । सुंदरकांड संपविलें ॥११॥ किंकरवनकरांचा तोडा[७] । अखया उपटोनियां दुर्गापुढां । लंका जाळोनि भडभडां। सुंदरकांडा संपविलें ॥१२॥ शुद्धि सांगोनि रामापुढां । गेला सिंधूसीं स्वयें रोकडा। झाडोनि समुदाचा पादाडा[८]। सुंदरकांडा संपविलें॥१३॥ दशयोजनें रुंद येवढा। दशयोजनें सेतु गाढा। राम आणोनियां लंकापुढां। सुंदरकांडा संपविलें ॥१४॥ संपवोनि सुंदरकांडा। पुढें युद्धकांडाचा झगडा । श्रीराम करील राक्षसरगडा। प्रतापवाडा अवधारा ॥१५॥ एकाजनार्दना शरण। सुंदरकांड संपवून। पुढे युद्धकांड निरूपण। गोड रामायण अवधारा॥१६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे सुंदरकांडे एकाकारटीकायां रावणसेनासंवादे अतिकायरावणप्रबोध: श्रीरामलंकागमनं च नाम द्विचत्वारिंशत्तमोऽध्याय: ॥४२॥ ओंव्या ॥११६॥ श्लोक ॥२२॥ एवं ॥१३८॥

## सुंदरकांड समाप्तम्

शब्दार्थ : १. क्षयरहित, सुरक्षित, २. वाणीने, ३. स्तब्ध होऊन, ४. खजिल झाला, ५. मोठे, ६. आवडीने, इच्छेने, ७. नाश, ८. अभिमान, गर्व

10-6-15

श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## युद्धकांड

### अध्याय पहिला

॥ श्रीसद्गुरुरामचंद्रायनमः॥

#### वानरसैन्य मोजण्यासाठी रावण हेर पाठवितो

उदार गंभीर सुंदरकांड। तें संपवूनि अतिशयें गोड।
पुढां उठावलें युद्धकांड। अति प्रचंड प्रतापी ॥१॥

**रामायणाचे महत्त्व त्यातील परमार्थ :** वाखाणावया युद्धकांड। माझें केंवी सरतें[1] तोंड। तरी जनार्दनकृपा अखंड। जे कांडें कांड अर्थवी॥२॥ रामायणींचा सखोल[2] अर्थ। वक्ता जनार्दन समर्थ। सबाह्य परिपूर्ण रघुनाथ। ग्रंथ परमार्थ श्रीराम॥३॥ रामायणींचें निजसार। क्षरीं कोंदलें अक्षर। पदापदार्थ चिदचिन्मात्र। परम पवित्र रामकथा॥४॥ कथेमाजील कथार्थ। सबाह्य कोंदला रघुनाथ। हाचि ग्रंथींचा परमार्थ। निजात्मस्वार्थ साधका॥५॥

**एकनाथांचे आत्मनिवेदन -श्रीरामांच्या अनुमतीनेच मी लिहितो :** विषम[3] जरी रामचरित्र। तरी ते कथा चिन्मात्र। जनार्दनकृपा अति उदार। कथा सुखसार स्वानंदें॥६॥ माझें जें वदतें वदन। स्वयें जाला रघुनंदन। वचनावचनीं निर्वचन। कथा पावन श्रीरामें॥७॥ श्रीरामकथेचा गुह्यार्थ। यथार्थ वदवी रघुनाथ। माझें हातीं लेखणी दऊत। कथा लिहिवीत श्रीराम॥८॥ माझें दृष्टीचें देखणेपण[4]। श्रीराम होवोनि आपण। दावी कथानिरूपण। जागृतिस्वप्नसुषुप्तीं[5]॥९॥

शब्दार्थ : १. योग्य, २. फार खोल, ३. अवघड, ४. पाहाणे, ५. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांमध्ये सुषुप्ती-गाढ झोप.

सर्व अवस्थांमध्ये श्रीरामांचाच ध्यासः जागृतीं स्वयें कर्म करितां। तंव कर्मी प्रकटे श्रीरामकथा। स्वप्नीं प्रकटे निजगुजवार्ता। होय सांगता श्रीराम ॥१०॥ सुषुप्तीं करितां सुखें शयन। तेथें नाहीं जन्ममरण। नाहीं कर्मधर्माचरण। सुषुप्ति पूर्ण श्रीराम ॥११॥ करूं बैसतां भोजन। ग्रासोग्रासीं रामायण। जेवणीं गोड श्रीरामभजन। दावी आपण श्रीराम ॥१२॥ चवी चाखतां रसाआंत। रसस्वाद श्रीरघुनाथ। करोनि भोजनाचा अंत। रामायणार्थ राम दावी ॥१३॥ चाखूं जातां रसस्वादन। रस रसना रघुनंदन। श्रीरामें स्वानंदभोजन। रामायण अति गोड ॥१४॥ चाखतां रामायणगोडी। रस रसना रसत्व सांडी। दृष्टि दृश्यातें ओसंडी[१]। जोडितां जोडी रामकथा ॥१५॥ करूं जातां सुखें शयन। विसरों नेदी रामायण। शेज बाज अंथरूण। होय आपण श्रीराम ॥१६॥ रामायण लिहावयाअर्थीं। जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं। विसंबेना रघुपती। अहोरातीं रामकथा ॥१७॥

अहोरात्र त्यांच्याकडूनच मला प्रेरणा होत आहे : रामायण लिहावयासाठीं। रामें पुरविली माझी पाठी। मीपण हरोनि हटाहटीं। कथा मराठी स्वयें दावी ॥१८॥ श्रीरामाची रामकथा। ते चहूं मुक्तींतें हाणी लाता। निर्भर्त्सून चहूं पुरुषार्था। कथार्थता परब्रह्म ॥१९॥ एवढा साधकाचा स्वार्थ। साधावया श्रीरघुनाथ। रामायण स्वयें लिहिवीत। शुद्ध परमार्थ रामकथा ॥२०॥

हरिकथा निरूपणाचे फळ : असो हरिकथानिरूपण। नित्य करितां नामस्मरण। स्वयें ब्रह्म ये ओरसोन[२]। जेंवी कां धेनु वत्सासीं ॥२१॥ रामनामस्मरणासाठीं। परब्रह्मींच पडे मिठी। तें नाम सांडून करटीं। करिती अटाटी कुशमृत्तिकां[३] ॥२२॥ न कर्मणा न प्रजया श्रुती। कर्में नव्हे पदप्राप्ती। कर्में ते देहधर्मास्थिती। परब्रह्मप्राप्ती रामनामें ॥२३॥ ऐसी रामनामाची ख्याती। तो श्रीराम लंकेप्रती। घेवोनि आला वानरपंक्ती। लंकापती दंडावया ॥२४॥

सरसैन्ये सागरे तीर्णे रामे दशरथात्मजे। अमात्यौ रावणः श्रीमानब्रवीच्छुकसारणौ ॥१॥
वानरीं तनुमास्थाय परिसंख्यातुमर्हथः। बलं यात्राविधानं च योधानां च विनिर्णयः ॥२॥
व्यवसायं च रामस्य वीर्यं प्रहरणानि च। लक्ष्मणस्य च सौमित्रेस्तत्त्वतो ज्ञातुमर्हथः ॥३॥

युद्धकांडाचा विषयप्रवेश : समुद्रीं सेतु बांधोन। वानरसेना घेऊन। लंके आला रघुनंदन। भेरी निशाण लाऊनी ॥२५॥

श्रीरामांचे लंकेत आगमन, त्याचा रावणावर झालेला परिणाम शुकसारण या हेरांना पाठवितो : आला देखोनि रघुनंदन। रावण जाला अति उद्विग्न। पाचारोनि शुकसारण। दुःख दारुण आलोची[४] ॥२६॥ माझे प्रधान उन्मत्त पूर्ण। नाहीं स्वहिताची आठवण। करितां वारुणीमाध्वीमद्यपान। तेथें पाठवी कोण हेर चार ॥२७॥ असो माझ्या प्रधानांची कथा। माझी मजचि पडली चिंता। लंके आल्या श्रीरघुनाथा। काय म्यां आतां करावें ॥२८॥ तुम्हीं जावोनि हेरवृत्तीं। श्रीरामसैन्य आहे किती। झुंझार आणि वीरवृत्ती। संख्या मजप्रती सांगावी ॥२९॥ श्रीरामाचा उत्साह पूर्ण। शस्त्रास्त्रें दुर्धर बाण। सखा सौमित्र लक्ष्मण। त्याची आंगवण मज सांगा ॥३०॥ श्रीरामाचें बळ दळ। वानरांचें शौर्य शीळ। लक्ष्मणाचा रणकल्लोळ। करोनि विवळ[५] मज सांगा ॥३१॥

इति प्रतिसमादिष्टौ राक्षसौ शुकसारणौ। कपिरूपधरौ वीरौ प्रविष्टौ वानरं बलम् ॥४॥
तौ गत्वा मायया छन्नौ राक्षसेंद्रस्य मंत्रिणौ। सारणश्च शुकश्चैव संख्यातुं नाधिजग्मतुः ॥५॥

वानरांची साद्यंत माहिती आणण्याचा त्यांना हुकूमः जातां राक्षसवेषस्थिती। कपि तुमचा

शब्दार्थ : १. टाकी, २. प्रेमयुक्त होऊन, पान्हा फुटून, ३. याग-यजनांत दर्भांचा व मातीचा उपयोग, ४. पाहे. ५. स्पष्ट.

घात करिती। घेवोनि[1] वानरवेषबुंथी[1]। सैन्यसंपत्ती गणावी ॥३२॥ ऐकोनि रावणाचें वचन। शुक आणि सारण। वानरवेष धरोनि जाण। आलें आपण कपिसैन्यीं ॥३३॥ सैन्य पाहतां निवाडें[2]। वानर दाटले चहुकडे। रिती पृथ्वी दृष्टी न पडे। मागें पुढें कोंदले ॥३४॥ वानर दाटले भूतळीं। वानर दाटले नभःस्थळीं। वानर दाटले जळीं-स्थळीं। लंकामूळीं कलकलती ॥३५॥ तेथें करितां शंखस्फुरण। वानरसंख्या न करवे जाण। थोटावले शुकसारण। वानरगण न गणवती ॥३६॥ एक आदळले लंकेसीं। असंख्य वानर आकाशीं। कपि कोंदले पृथ्वीसीं। सिंधूपासीं अगणित ॥३७॥ मागून वानरांच्या परवडी। सवेग धांवती तांतडीं। नळ नीळ अंगद वीकोडी। अति कडाडीं पैं आले ॥३८॥ श्रीरामापाठीसीं वानर। अर्बुदें निर्बुदें पद्मनिकर। त्यांमागें सुग्रीवाचा भार[3]। अति अपार असंख्य ॥३९॥ त्याहीवेगळे पैं जुत्पती। वेगळे वेगळे भार नेणों किती। संख्या करितां शंखस्फूर्ती। सैन्यसंपत्ती न गणवे ॥४०॥ शोधितां वानर पाळतिनें[4]। तंव ओळखिले बिभिषणें। त्यांची लक्षून लक्षणें। धरलें तेणें साटोपें ॥४१॥

तौ ददर्श महामायौ प्रतिच्छन्नौ बिभिषणः। ग्राहयित्वा महातेजा वानरैर्वानरोपमौ ॥६॥
आचचक्षे स रामाय तावुभौ शुकसारणौ। तौ दृष्ट्वा व्यथितौ रामं निराशौ जीवितं प्रति ॥७॥
सुप्रसन्नोऽब्रवीद्रामः सर्वभूतहिते रतः। वधार्हौ वां प्रमुंचामि दृष्ट्वा सैन्य; समंततः ॥८॥
वक्तव्यं राक्षसं गत्वा यथोक्तं वचनं मम। श्वोभूते नगरीं लंकां सप्राकारां सतोरणाम् ॥९॥
रक्षसां च बलं पश्य शरैर्विध्वंसितं मया ॥१०॥

बिभीषण त्या हेरांना ओळखतो व श्रीरामांकडे त्यांना नेतो. श्रीराम त्यांना शिक्षा न करिता सोडून देतात : दोहीं हेरांचें लक्षण। लक्षूं जाणें बिभीषण। त्याही लक्षणांचें लक्षण। अति विंदाण अवधारा ॥४२॥ उड्डाण विराण उलटें किरण। करूं नेणती शुक सारण। अवघे म्हणती कपटी पूर्ण। धरी धांवोन बिभीषण ॥४३॥ आणिकें त्यांसी धरूं जातां। दोघे पळती लघुलाघवता। बिभीषण जाणे राक्षसां समस्तां। होय धरिता धांवोनी ॥४४॥ वानरीं बांधोनि वानरवेशी। शीघ्र आणिले रामापासीं। राम कृपाळु सर्व भूतांसी। काय त्यांसी बोलता ॥४५॥ रावण चोर तुम्ही त्याचे हेर। वधा योग्य बोले शास्त्र। तरी मी न मारीं साचार। वानरभार पहा माझा ॥४६॥ आणिकापासून हे पळती। म्हणोनि दिधले हनुम्याहातीं॥ राक्षस मावांची व्युत्पत्ती। पुच्छप्रती चालेना ॥४७॥ दोघे धरोनि पुच्छावर्ती। स्तोमें स्तोमें[5] ऋक्षजुत्पत्ती। दाखविली सैन्यसंपत्ती। रावणाप्रती सांगावया ॥४८॥ तुम्ही दोघे मारलिया जाण। कोण आमुचें दादुलेपण[6]। रावणापासी माझें वचन। स्वयें गर्जोन सांगावें ॥४९॥ प्रातःकाळीं कडकडाट। करीन राक्षसां सपाट। बाणीं भेदून त्रिकूट। दशकंठ छेदीन ॥५०॥ माझे बाण सुटल्या देखा। झाडिती तोरणें पताका। बाणीं विध्वंसूनि लंका। दशमुखा छेदीन ॥५१॥ अपराधी निरपराधी। श्रीराम पाहे समानबुद्धी। दोघे सोडविले त्रिशुद्धी। कृपानिधि कृपाळुवें ॥५२॥ सांगोनि पराक्रम पुरुषार्थ। दोघां करविलें निर्मुक्त। स्वयें चळचळां कांपत। लंकेआंत ते आले ॥५३॥

इति प्रतिसमादिष्टौ राक्षसौ शुकसारणौ॥ आगम्य नगरीं लंकामब्रूतां राक्षसाधिपत् ॥११॥
बिभीषणगृहीतौ तौ वधार्थं राक्षसेश्वरः। दृष्ट्वा धर्मात्मना मुक्तौ रामेणामिततेजसा ॥१२॥
एकस्थानगता यत्र चत्वारः पुरुषर्षभाः। रामो दाशरथिःश्रीमान्लक्ष्मणश्च बिभीषणः ॥१३॥

---

शब्दार्थ : १. वानररूप धारण करून, २. लक्ष्यपूर्वक, ३. सैन्यसमूह, ४. पाळत ठेवून, ५. समूहांनी, ६. पुरुषार्थ, मोठेपणा.

सुग्रीवश्च महातेजा महेंद्रसमविक्रमः। एते शक्ताः पुरीं लंकां सप्राकारां सतोरणाम् ॥१४॥
उत्पाट्य संक्रामयितुं सर्वे तिष्ठंतु वानराः। यादृशी श्रीहि रामस्य वीर्यं प्रहरणानि च॥१५॥
हनिष्यति पुरीं लंकामेकस्तिष्ठंतु ते त्रयः॥१६॥

हेरांची शोचनीय अवस्था : चोर अपराधी वधयुक्त। ते श्रीरामें केले निर्मुक्त। थाकें चळचिळां कांपत। आले धांवत लंकेसीं॥५४॥ रावण देखतांहि दृष्टीं। थाकें थाप न सामये पोटीं। बोबडी वळलीसे होटीं। सांगतां गोष्टी चळकांप॥५५॥ स्वस्थ होवोनि निवाडें। गोष्टी सांगती रावणापुढें। वानरसैन्य असंख्या गाढें। संख्या न घडे निश्चित॥५६॥ आम्ही जातां दोघे जण। बिभीषणें धरिलें ओळखोन। नेतां रामापासीं बांधोन। अचुक मरण आम्ही भानूं॥५७॥ मारावें म्हणे बिभीषण। मारा म्हणती वानरगण। राम धर्मात्मा आपण। दिधलें सोडून प्रतापदृष्टीं॥५८॥ हे मारिल्या दोघे जण। आम्हीं काय जिंतिला रावण। त्यांसी दाखवा वानरसैन्य। पाळती गणा सर्वही॥५९॥

त्यांना मिळालेला रामांचा आदेश ते रावणाला सांगतात : देवोनि हनुमंताचे हातीं। आम्हां दाखविली सैन्यसंपत्ती। असंख्य वानरांचिया जाती। संख्या सर्वार्थी न करवे॥६०॥ एक एक मर्कट। वधू पाहे दशकंठ। लंका मानिती फोलकट। बळं उद्भट[१] वानरां॥६१॥ सप्राकार[२] सतोरण। विध्वंसावया लंकाभुवन। चौघांपासीं प्रताप पूर्ण। कोण कोण ते ऐका॥६२॥ श्रीराम आणि लक्ष्मण। घरचा भेदी बिभीषण। सुग्रीव राजा विजयी पूर्ण। म्हणती क्षणें रावण निर्दाळूं॥६३॥ लंका उपडोनियां समूळीं। निक्षेपावया[३] समुद्रजळीं॥ हेचि चौघे आतुर्बळीं[४]। करावया होळी राक्षसां॥६४॥ असो या तिघांच्या ख्याती। एकाला एक रघुपती। रावण वधून बाणावर्ती। लंका भस्मांती नेऊं पाहे॥६५॥ आडवे आलिया प्रधान। इंद्रजित मकराक्ष कुंभकर्ण। अतिकायादिपुत्रदळण। लंकाभुवन भस्मांत॥६६॥ राक्षसांची जाती व्यक्ती। रणीं करील समाप्ती। एवढा प्रतापी श्रीरघुपती। एकला त्रिजगती[५] दमूं शके॥६७॥ प्रताप पुरुषार्थ गर्जोन। स्वयें बोलिला रघुनंदन। प्रभाते रणकंदण। करीन रावणवधार्थ॥६८॥ ऐकोनी सारणाचें वचन। रावण जाला अति उद्विग्न। तें देखोनि त्याचें चिन्ह। सांगे सारण हितवाक्य॥६९॥ युद्ध करितां दशशिर। रणीं नाटोपती वानर। निर्दाळोनि निशाचर। लंकापुर विभांडिती॥७०॥ वानरांपुढें नुरे दळ[६]। वानरांसी न चले बळ। वानरांशी युद्धकल्लोळ। सर्वथा सकळ करूं नये॥७१॥

प्रहृष्टयोधध्वजिनी वनौकसां। महात्मनां संप्रति युद्धमिच्छताम्।
अलं विरोधेन शमो विधीयतां। प्रदीयतां दाशरथेर्हि मैथिली॥१७॥

श्रीराम आणि लक्ष्मण। शस्त्रास्त्रीं अति प्रवीण। त्यांसीं सर्वथा न करवे रण। सुटल्या बाण प्राणांत॥७२॥ हेचि चौघे रणकंदनार्थ। करावया हर्षेयुक्त। शस्त्रास्त्रीं अति उदित[७]। राक्षसांत श्रीराम॥७३॥ तैसेच वानर समस्त। युद्धीं थांबवोनि श्रीरघुनाथ। निर्दाळावया लंकानाथ। आज्ञा पुसत आल्हादें॥७४॥ विजयध्वजी वानरसेना। सुग्रीवें पाळिली जाणा। निर्दाळावया रावणा। आंगवण पावती॥७५॥ सुग्रीव राजा उठाउठीं। उडी घालोनि त्रिकूटीं। मारील राक्षसांच्या कोटी। आवघ्यांशेवटीं रावण॥७६॥ असो ह्या महावीरांची मात। एकला एक हनुमंत। करूं पाहे तो लंकाघात। त्याचा पुरुषार्थ तुम्ही जाणा॥७७॥

त्यांच्याकडून सूचना : त्यासी न करावें रण। त्रिसत्य सत्य रावणा जाण। सीता देऊनि रिघतां शरण। कृतकल्याण[८] पावसी॥७८॥ सीता अर्पावी श्रीरघुनाथा। यालागीं चरणीं

शब्दार्थ : १. मोठे, २. तटांसह, ३. टाकण्यास, ४. पराक्रमी, ५. त्रैलोक्य, ६. सैन्य, ७. तयार, उद्युक्त, ८. मोठे कल्याण.

ठेवितों माथा। नको नको युद्धकथा। प्राणांतव्यथा पावसी।।७९।। सीता देउनि आवश्यक। सखा केलिया रघुकुळटिळक। सार्थक इहलोक परलोक। परम सुख पावसी।।८०।। हित पथ्य सत्य पूर्ण। ऐकोनि सारणाचें वचन। रावण वदे दुरभिमान। दुष्टदुर्जन दुरुक्ती।।८१।।

तद्वचः पथ्यमक्लिष्टं सारणेनाभिभाषितम्। निशम्य रावणो राजा प्रत्यभाषत सारणम्।।१८।।
यदि मामभियुंजारन्देवगंधर्वदानवाः। नैव सीतां प्रदास्यामि सर्वलोकभयादपि।।१९।।
त्वं तु सौम्य परित्रस्तस्तो दृष्ट्वा हरिवाहिनीम्। प्रतिपदानं सीताया अतत्स्वं साधु मन्यसे।।२०।।

त्यावर रावणाची प्रतिक्रिया : देव दानव गंधर्वयुक्त। सुरेंद्र आलिया पायां पडत। तरी सीता न करीं मी निर्मुक्त। जाण निश्चित सारणा।।८२।। शिव आलिया त्रिशूळयुक्त। ब्रह्मा आलिया शाप देत। ऐसाही मांडल्या प्राणांतं। सीता निर्मुक्त मी न करीं।।८३।। तूं तंव भेड[1] हीन दीन। देखोनि वानरांचें सैन्य। भय घेतलें दारुण। कंपायमान बोलसी।।८४।।

हेरांचा धिक्कार : भेणें भयें म्हणसी आतां। सीता अर्पावी रघुनाथा। हे तंव तुझी सभय कथा। मी सर्वथा नायकें।।८५।। आतां कळलें मज तत्त्वतां। श्रीराम न करी तुमच्या घाता। दोघे सोडिले जीवें जीतां। यालागीं सीता तूं दे म्हणसी।।८६।। अनुसरलासी श्रीरामाकडे। त्याचें भय मज सांगसी गाढें। जें जें बोलसी तें कुडें। दोनी भ्याडें नपुंसक।।८७।। जो ज्याचें राखी जीवित। तो त्याचा होय अति आप्त। यालागीं तूं म्हणसी येथ। सीता निर्मुक्त[2] करावी।।८८।। आतां तुम्ही दोघे जण। श्रीरामाचे आप्त पूर्ण। मजसंमुख माझे अवगुण। अति कठिण अनुवादतीं।।८९।।

राजदंडपरामृष्टास्तिष्ठंते नापराधिनः। हन्यामहं त्विमौ पापौ शत्रुपक्षप्रशंसकौ।।२१।।
तेनैव मुक्तौ सुप्रीतावुभौ तौ शुकसारणौ। रावणं जयशब्देन प्रतिपूज्याभिनिःसृतौ।।२२।।

यापुढे राजदोष सांगणारांना शासन: राजदोष जे अनुवादती[3]। ते अपराधी शास्त्रनीतीं। दंड पावलां माझे हातीं। पापमूर्ती तुम्ही दोघे।।९०।। वीर्य शौर्य बळ संपूर्ण। वैरियाचे अत्यंत वानां[4] गुण। माझे अनुवादां अवगुण। वध्य[5] संपूर्ण तुम्ही दोघे।।९१।। सत्यासत्यविवेक पूर्ण। न करितांचि रावण। वधावया शुक सारण। शस्त्र सज्जून उठिला।।९२।। रावणा वधिती वानरगण। ऐसें अनुवादां दोघे जण। तुमचा घेईन मी प्राण। पक्षपाती पूर्ण रामाचे।।९३।। हेर चार अवध्य पूर्ण। श्रीरामाने दिधले सोडून। त्यांचें मी केंवी करीं हनन। लज्जायमान रावण।।९४।। ऐसियापरी रावण। दवडोनि शुक सारण। कोपें म्हणे काळें वदन। मुख परतोन न दावावें।।९५।। जयशब्दें रावणस्तुती। करूनि शुक सारण पुढतीं। रावण पडला चिंतावर्ती सबळ रघुपती देखोनी।।९६।।

रावण शार्दूलास पाठवितो : गेलिया शुक सारण। चिंतावर्तीं[6] पडे रावण। शार्दूल चार[7] विचक्षण। धाडी कपिसैन्य गणावया।।९७।। चारांमाजीं प्रबळबळ। लघुलाघवी[8] अति कुशळ। यालागीं नांवें शार्दूळ। वानरदळ गणूं आला।।९८।। शार्दूळ जंव स्वयें पाहत। तंव वानरसैन्य असंख्यात। गणावया वाचा चित्त। जेथींचा तेथ पांगुळला[9]।।९९।।

बिभीषणेन तत्रस्था निगृहीतो यदृच्छया। शार्दूलो ग्राहितस्त्वेकः पापोयमिति राक्षसाः।।२३।।
वानरैर्दितास्ते तु विक्रांतैर्लघुविक्रमैः। पुनर्लंकामनुप्राप्तो विमुक्तो रामशासनात्।।२४।।

शार्दूळ येतांच देखोन। बिभीषणें धरिला ओळखोन। नेला दृढपाशीं बांधोन। रघुनंदनसभेसीं।।१००।।

---

शब्दार्थ : १. भित्रा, २. मोकळी, ३. बोलतात, ४. वर्णिता, ५. ठार मारण्यास योग्य, ६. काळजीच्या फेऱ्यात, ७. शार्दूल नावाचा हेर, ८. मोठा कावेबाज, ९. स्तब्ध झाला, वेडावला.

त्याला ओळखून रामापुढे आणल्यावर त्यालाही रामांनी सोडून दिले : वानर हाणिती दृढ मुष्टी। लाता देती कटीं पृष्ठीं। श्रीराम कृपाळू जगजेठी। कृपादृष्टीं सोडिला॥१॥ धरूनि आणिला अति संकटीं। चार हेर मारिल्यासाठीं[1]। काय ते वाढीव होय मोठी। बुद्धि करंटी अल्पक॥२॥ श्रीरामें शार्दूळ पाचारून। दाखवून वानरसैन्य। त्यासी देवोनि सन्मान। दिधला सोडून साक्षेपें॥३॥ श्रीरामें सोडितांचि देख। घेवोनि वानरांचा धाक। शार्दूळ लंकेसंमुख। गेला दशमुख ठाकोनि॥४॥ सर्वांगीं रुधिरोक्षित[2]। शार्दूळ देखोनियां येत। दचकला लंकानाथ। बळोद्धत वानर॥५॥ शार्दूळाचा अति पुरुषार्थ। त्यासी वानरीं घातली लात। रडत पडत अति कुंथत। आला थकत सभेसीं॥६॥ श्रीरामकटकीं चारपण। न चले बिभीषणाभेण। तो धरितां दृढ बांधोन। रघुनंदन सोडवित॥७॥ एका जनार्दना शरण। रावणें पाहतां वानरसैन्य। श्रीराम करील छत्रभंजन। अनुसंधान बाणें एकें॥८॥ ऐसें गोड निरूपण। श्रोतीं व्हावें सावधान। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥९॥ रम्य रामायणी कथा। अति रमणीय वाल्मीक वक्ता। अनागत[3] भाष्य वदला कथा। साधुसंतां सुखकारी॥११०॥ कथा सकामासी गोड। निष्कामाचें पुरवी कोड सदाशिवासी सुखसुरवाड। गोडाही गोड रामकथा॥११॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां चारप्रेरणं नाम प्रथमोऽध्यायः॥१॥ ओव्यां॥ १११॥ श्लोक ॥२४॥ एवं॥१३५॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु॥

## अध्याय दुसरा

॥ श्रीरामचंद्राय नमः॥

### श्रीरामांकडून रावण - छत्राचा भंग

शार्दूळ परत येतो, त्याची बिकट अवस्था व त्याचे कथन : पूर्वप्रसंगवृत्तांत। रडत पडत कुंथत। शार्दूळ आला रुधिरोक्षित। तयासी पुसत लंकेश॥१॥

वीक्ष्यमाणो विषण्णं तु शार्दूलं शोककर्षितम्। उवाच प्रहसन्नेव रावणो भीमदर्शनः॥१॥
अयथावच्च ते वर्णो दीनश्चासि निशाचर। नासि कश्चिदमित्राणां क्रुद्धानां वशमागतः॥२॥
इति तेनानुष्टस्तु वाचं मंदमुदीरयत्। न ते चारयितुं शक्या राजन्वानरपुंगवाः॥३॥
नापि संभावितुं शक्यं संप्रश्नोपि न लभ्यते॥४॥

शार्दूळ देखोनि अति दुःखीत। त्यासी पुसे लंकानाथ। वैरिसासी जालासी हस्तगत। रुधिरोक्षित दिसतोसी॥२॥ सादरें पुसतां रावण। शार्दूळ बोले अति कुंथोन। असंख्यात वानरांचें सैन्य। संख्या कोण करूं शके॥३॥ अमुके एक वानर असती। ऐसी भावना[4] न करवे चित्तीं। संख्या पुसतां वानरांप्रती। तेही सांगती असंख्य॥४॥ वाचस्पतीची[5] वाचा मुरडे। वेदवाचा बोबडी पडे। रामसैन्याची संख्या न घडे। निजनिवाडें लंकेशा॥५॥ श्रीरामसैन्याचें गणित। करावया ब्रह्मा नसे समर्थ। आम्ही काय मशक[6] तेथ। संख्या समर्थ करावया॥६॥ श्रीरामकटकीं[7] चारपण[8]। सर्वथा न करवे जाण। मुख्य वैरी आम्हां बिभीषण। तो ओळखोन धरितसे॥७॥

बिभीषणेन ज्ञातोऽहं वानरैश्च प्रधर्षितः। परिणीय च सर्वत्र नीतोऽहं रामसंसदि॥५॥

---

**शब्दार्थ :** १. मारल्यामुळे, २. रक्ताने माखलेला, ३. पुढील, ४. कल्पना, ५. बृहस्पतीची, ६. यःकश्चित्, ७. श्रीरामाच्या सैन्यांत, ८. हेरपणा.

हरिभिर्वध्यानश्च याचमानः कृतांजलिः। राघवेण परित्रातो जीवन्नेव विमोचितः॥६॥

आम्ही अति गुप्त मायावेषीं। माव[1] न चले बिभीषणापासीं। तेणें धरोनि अति वेगेंसी। वानरांपासीं दिधलें॥८॥ वानरीं नेतां कटकाआंत। स्तोमें स्तोमें हिंडवीत। लाता बुक्या टोले देत। तेणें कल्पांत मज जाला॥९॥ बळ सांगावया रावणापासीं। दळ दाखवितां मजसी। वानरीं करोनि कासाविसी। रामसभेसीं मज नेलें॥१०॥ हेर मारल्या कोण पुरुषार्थ। ऐसें बोलिला रघूनाथ। तेणें मज केलें निर्मुक्त। जीवें जीत मग जालों॥११॥

श्रीरामांची सूचना : श्रीरामांचें प्रतापबळ। असंख्य त्याचें दळ[2] सबळ। त्यासीं न चले युद्धकल्लोळ। जनकबाळ अर्पावी॥१२॥ सीता अर्पिल्या श्रीरघुनाथा। मरणोन्मुक्तीं लंकानाथा। स्वस्थता राक्षसां समस्तां। निर्भयता तिहीं लोकीं॥१३॥

पुरप्राकारमायांति क्षिप्रमेकतरं कुरु। सीतां वा संप्रयच्छाशु युद्धं वा संप्रदीयताम्॥७॥
शार्दूलस्य महद्वाक्यं श्रुत्वोवाच स रावणः। यदि मां प्रतियोत्स्यंति देवगंधर्वदानवाः॥८॥
नैव सीतां प्रदास्यामि सर्वलोकक्षयादपि॥९॥

उडोनिया वानरवीर। लंका घेती सप्राकार। अझून कायसा विचार। शीघ्रतर करीं एक॥१४॥ युद्धा निघावें लंकानाथा। कीं श्रीरामा द्यावी सीता। येविषयीं विलंबू करितां। कुळक्षयार्था पावाल॥१५॥ ऐकोनि शार्दूळवचन। रावण झाला कंपायमान। मिथ्या धरोनि दुरभिमान। स्वयें गर्जोन बोलत॥१६॥ आदि करोनि श्रीराघव। युद्धा आलिया देवदानव। साह्य दैत्यादि गंधर्व। सीता स्वयंमेव[3] मी न सोडीं॥१७॥ राक्षस मारिल्या समस्त। श्रीरामें केल्या कुळघात। मजही मांडल्या प्राणांत। तरी मी सीता सोडींना॥१८॥ मज रावणा जिवें जितां। सर्वथा मी न सोडीं सीता। ऐसें बोलणें बोलतां। परम चिंता पावला॥१९॥ चार[4] मारणें नाहीं रघुनाथा। तेथूनि चार येथें येतां। श्रीरामा अर्पी शीघ्र सीता। मज तत्वतां सांगती॥२०॥ ऐसा बोलिला बिभीषण। तैसेंचि बोलिला शुकसारण। शार्दूळ सांगतो आपण। भय दारुण रामाचें॥२१॥

वानरवीरांचे वर्णन : श्रीरामापासीं वानरवीर। कोण धुरा[5] थोर थोर। आतुर्बळी कोण झुंजार। दशशिर पूसत॥२२॥

तदपारमसंख्येयं वानराणां महद्बलम्। निशम्य रावणो राजा शार्दूलं पर्यपृच्छत॥१०॥
एवं के वानराः शूराः के मुख्याः के महाबलाः। के पूर्वं ह्यभिवर्तंतः के महोत्साहसंस्थिताः॥११॥
क्षिप्रमाचक्ष्व शार्दूल संप्रधानाः प्लवंगमाः। श्रुत्वा तद्राक्षसेंद्रस्य वचनं परिपृच्छतः॥१२॥
संख्यातुमुपचक्राम प्राज्ञो मुख्यन्प्लवंगमान्॥१३॥

रावणें पुसिले जुत्पत्ती[6]। वीर झुंजार आहेत कीती। शार्दूळ आपुल्या व्युत्पत्तीं। संकळित[7] सांगत॥२३॥ नळ नील रंभ पनस पन्नक। मैंद द्विविद सुमुख दुर्मुख। केशरी शतबळी दधिमुख। गवय गवाक्ष महावीर॥२४॥ विनीत[8] प्रमाथी[8] क्रोधन[8]। ऋषभ शरभ गंधमादन। फरश नाग सुषेण। इंद्रजानु जाण महावीर॥२५॥ गज गोरभ तार तरळ। उन्नाह सन्नाह कुमुद कुशळ। क्रकच कराळ विकराळ। गोळांगूळ[9] रणयोद्धे॥२६॥ जांबवंताचा ज्येष्ठ बंधु। धूम्राक्षनामा अति प्रसिद्धु। रीससमुदाय सन्नद्धु। अतत उन्नद्धु रणमारा॥२७॥ श्रीरामाजवळी जांबवंत। आतुर्बळीं बुद्धिवंत। मशकें राक्षसां मानित। कुंभकर्णा तृणप्राय॥२८॥ वीर दुर्धर हनुमंत। लंकेंत केला अति आकांत। तो अग्रणी सैन्यांत। त्याचा पुरुषार्थ तुम्ही जाणा॥२९॥

शब्दार्थ : १. माया, कपट, २. सैन्य, ३. स्वतः, ४. हेर, दूत, ५. मुख, ६. जेठी, मल्ल, ७. थोडक्यात, संक्षेपाने, ८. या नावांचे राक्षस, ९. वानर.

ऋषिरामायणीं वीर। सांगितले अति अपार। तितुका न धरींच मी विस्तार। कथा अपार वाढेल॥३०॥ हनुमंताचेनि नांवें। रावण दचकला जीवें भावें। इतर महावीरांचे यावे। कोण साहे लंकेशा॥३१॥ श्रीरामांचें प्रतापबळ। ऐकोनि वानरसेना सबळ। रावणा लागली तळमळ। जनकबाळ जिरेना॥३२॥

एवमुक्त्वा महातेजा रावणः पुनरब्रवीत्। चारिता भवता सेना शूराः के तत्र वानराः॥१४॥

किंप्रजाः किंदृशाः सौम्य वानरा ये दुरासदाः। कस्य पुत्राश्च पौत्राश्च तत्त्वमाख्याहि राक्षस॥१५॥

अथैवमुक्तः शार्दूलो रावणं पुनरब्रवीत्। इदं वचनमारेभे वक्तुं रावणसंनिधौ॥१६॥

वानरवीर अति अपार। कोण कोणाचा पुत्र पौत्र। सत्कूळ किंवा वनचर। हेंही समग्र मज सांगा॥३३॥ मुख्य ब्रह्मयाचा सुत। आतुर्बळी बुद्धिवंत। नांवें जांबवंत ऋक्षनाथ। अति विख्यात रणयोद्धा॥३४॥ सूर्याचा निजसुत। सुग्रीवराजा वीर विख्यात। करावया राक्षसांचा घात। लंकेआंत रिघों पाहे॥३५॥ अंगद युवराज विख्यातु। जो कां स्वयें शक्राचा नातु। लंका उपडून न्यावया शक्तु। काळकृतांतु रणयोद्धा॥३६॥ धर्मसुत[1] सुषेण देख। सोमसुत[2] दधिमुख। दोघे वीर अति नेटक। अंतका अंतक रणमारा॥३७॥ समुख दुर्मुख मृत्यूपुत्र। केवळ मृत्यूचाच अवतार। रणीं मर्दिती निशाचर[3]। यांसमोर कोण राहे॥३८॥ अग्निपूत्र नामें नीळ। त्या अधीन वानरदळ। सेनापति स्वयें प्रबळ। राक्षस कुळ मारावया॥३९॥ मैद द्विविद महावीर। अश्विनौदेवांचे कुमर। यमाचें पंच पुत्र। अति दुर्धर ते ऐका॥४०॥ गज गवाक्ष गवय जाण। शरभ आणि गंधमादन। वैवस्वतपुत्र पांचही जाण। वीर दारुण रणमारा॥४१॥ विश्वकर्म्याचा नळ सुत जाण। जेणें बांधिलें सेतुबंधन। उतरोनि वानरसैन्य। लंकादहन करूं आला॥४२॥ केशरीचा क्षेत्रज सुत। वायुपुत्र जो कां विख्यात। दोहों बापांचा हनुमंत। ज्याचा पुरुषार्थ तिहीं लोकीं॥४३॥ हनुमान वीर अति बळी। लंका करूं पाहे रांगोळी[4]। शिरें खेळत चेंडूफळी। रणरवंदळी[5] राक्षसां॥४४॥

दशवानरकोट्यश्च सुराणां युद्धकांक्षिणाम्। श्रीमतां देवपुत्राणां शेषं नाख्यातुमुत्सहे॥१७॥

वानरांची संख्या व व्यक्तिशः वर्णन : दशकोटी वानरवीर। श्रेष्ठ अग्रणी सेनाधर। याहूनि असंख्य अपार। सांगावया वक्त्र[6] सरेना[7]॥४५॥ गणवेल पृथ्वीच्या अंकुरां। सुखें गणवती पर्जन्यधारा। तरी न गणवे वानरभारां। दशशिरा हें सत्य॥४६॥ वानरांचा सबळ सद्भावो। एकैकातळीं सैन्यसमुदावो। कोट्यनुकोटी अर्बुदें[8] खर्व। सेना सर्व वागविती॥४७॥ वीरानुवीरीं सैन्यवृत्तांत। प्रत्येकें लिहितां वाढेल ग्रंथ। आतां सांगेन मुख्यार्थ। सैन्यसख्यार्थ दोघांचा॥४८॥ अंगद युवराजा कपिपती। सुग्रीव महाराजा भूपती। त्या दोघांची सैन्यसंपत्ती। संकलितार्थीं सांगेन॥४९॥

एवं वानरराजेन सुग्रीवेणाभिभाषितः। वीरपद्मसहस्रेण वृत्तः शंकुशतेन च॥१८॥

युवराजोंऽगदो नाम त्वामाह्वयति संयुगे॥१९॥

श्रीरामाज्ञा यथोचित। अंगदा युवराज्य प्राप्त। सुग्रीव राजा अभिषिंचित। मंत्रयुक्त उल्लासें॥५०॥ अंगदाची सैन्यसंपत्ती। ऋषि वाल्मीक वदला ग्रंथी। तेचि सांगेन उपपत्ती। यथानिगुतीं अवधारा॥५१॥ शतसहस्त्रीं लक्ष म्हणती। शतलक्षीं कोटी गणिती। शतकोटी अर्बूद ख्याती। निर्बुद म्हणती तच्छतें॥५२॥ शत निर्बुदीं खर्व गणिती। शतखर्वीं निस्त्रर्व म्हणती। शतनिखर्वीं पद्म वदती। जाण निश्चितीं महाराजा॥५३॥ पद्मसहस्र वीर रणरंगीं। चालती अंगदाच्या वामभागीं। दक्षिणभागींच्या प्रयोगीं। वीरविभागी अवधारा॥५४॥

शब्दार्थ : १. यमाचा मुलगा, २. चंद्राचा पुत्र, ३. राक्षस, ४. भस्म, ५. समरांगणीं नाश, ६. मुख, ७. पुरत नाही. ८. दशकोटी.

पद्मशताच्या गणती। शंकुशब्द त्यातें म्हणतीं। शंकुशतें वीर विख्याती। दक्षिणहस्तीं अंगदा ॥५५॥ अंगद बोलिला पुरुषार्थी। सैन्य प्रधान मशक कितीं। रणीं मारीन लंकापती। तुज युद्धार्थी पाचारी ॥५६॥ अंगद सेनासंख्यास्थिती। पद्मसहस्र वामभागार्थीं। शंकुशतें दक्षिणहस्तीं। रणकंदनार्थी महाबळी ॥५७॥ ऐकतां अंगदसैन्यसंपत्ती। राक्षस महाशंख करिती। रावण दचकला चित्तीं। चिंतावर्ती[१] प्रधान ॥५८॥ शार्दुळ म्हणे दशानना। राजचिन्हीं गडगर्जना। आली सुग्रीवराजसेना। तिची गणना तूं ऐकें ॥५९॥ सुग्रीव श्रीरामकिंकर। रामें केला राज्यधर त्याचा सैन्याचा संभार। सविस्तर अवधारीं ॥६०॥

रामेण वालिनं हत्वा तस्य राज्येऽभिषेचितः। सुग्रीवस्तस्य यत्सैन्यं तत्सर्वं कथयामि ते ॥२०॥
शतं शतसहस्राणां कोटिमाहुर्मनीषिणः। शतं सहस्रकोटीनां शंकुरित्यभिधीयते ॥२१॥
शतं शंकुसहस्राणां वृंदमाहुर्मनीषिणः। शतं वृंदसहस्राणां महावृंदभिहोच्यते ॥२२॥
महावृंदसहस्राणां शतं पद्ममिति स्मृतम् । शतं पद्मसहस्राणां महापद्ममिति स्मृतम् ॥२३॥
एवं कोटिसहस्रेण पहापद्मशतेन च। एवं वृंदसहस्रेण महावृंदशतेन च।
एवं पद्मसहस्रेण महापद्मशतेन च। सुग्रीवः सहितो राजा संप्रहारार्थमुद्यतः ॥२५॥

श्रीरामें मारूनि वाळीसी। राज्य दिधलें सुग्रीवासी। ते राजसेना तयापासीं। समुदायेंसीं सन्नद्ध ॥ ६१ ॥ सहस्रांचें जें शत। त्यातें लक्ष ऐसें बोलत। लक्षाचें जें शत गणित। त्यातें म्हणत कोटि ऐसें ॥६२॥ वाल्मीक बोलिला येथ। तोच श्लोकींचा श्लोकार्थ । सहस्रकोटी शतसंख्यात। शंकु निश्चित त्या नांव ॥६३॥ शतशंकूंचें सहस्र[२] गणित। वृंद ऐसें त्यातें म्हणत। वृंदशतें सहस्र संख्यात। महावृंद निश्चित त्या नांव ॥६४॥ महावृंदशतसहस्रीं। पद्मसंख्या निजनिर्धारीं। पद्मशतें सहस्रवरी। ते संख्या खरी महापद्म ॥६५॥ सहस्रकोटी आणि शंकुशतक। सुग्रीवापुढें नित्य संमुख। वीर वाढिवें[३] चालती देख। एक एक रणयोद्धे ॥६६॥ सहस्रवृंदें वीर नेटक। महावृंदें शतानुएक। दक्षिणबाहू सुग्रीवा देख। येती सुमुख दशमुखा ॥६७॥ गणितां सहस्रपद्में पद्म। सुग्रीवाचे बाहू वाम। वीर वाढिवें प्लवंगम। अति दुर्गम रणयोद्धे ॥६८॥ शतसंख्या महापद्म। सुग्रीवासाठी कपिसत्तम। चालती वीर निरुपम। रणकर्दम करावया ॥६९॥ आणिक वानर अति उद्भट। सुग्रीवा मागेंपुढें थाट। वाम सव्य घनदाट। भट सुभट महाबळी ॥७०॥ याही समुदायीं वीर वानर। सुग्रीवासवें अति दुर्धर। ठाकोनि आले लंकापुर। दशशिर मर्दावया ॥७१॥ करावया राक्षसांचें दळण। लंकाशिखरावरी उड्डाण। करिताति वानरगण। मुख्य रावण दंडावया ॥७२॥ ऐसेंचि वेगळे वेगळे वीर। सांगों जातां सैन्यसंभार। कथा वाढूं पाहे फार। तरी वानर न गणवती ॥७३॥

यदत्रानंतरं कार्यं तद्भवान्कर्तुमर्हति। इत्युक्तो रावणः क्रुद्ध उत्थितः परमासनात् ॥ २६॥
आरुरोह ततः श्रीमान्प्रसादं हिमपांडुरम्। बहुतालसमुत्सेधं रावणो यद्दिदृक्षया ॥ २७॥
ताभ्यां चराभ्यां सहितः स ददर्श महाबलम् ॥२८॥

रावण उंच जागी गोपुरावर जाऊन वानरसैन्य पाहतो : शार्दूल म्हणे दशानना। सांगितली वानरसेना। याउपरी जें येईल मना। त्या साधना शीघ्र साधीं ॥७४॥ ऐकोनि वानरांची सेना। कोप आला दशानना। सांडोनियां निजसिंहासना। पहावया नयनीं ऊठिला ॥७५॥ सातखणी[४] प्रासाद[५] थोर। त्याहीवरी दीर्घ गोपुर[६]। तेथें चढला दशशिर। वानरभार पहावया ॥७६॥ उंची सप्तताळ अधिक। पांडुरवर्ण प्रासाद चोख। तेथ चढला दशमुख। कपिकटक पहावया ॥७७॥ हेर चार साही प्रधान। गोपुरीं चढला दशानन। पाहूं चढले

**शब्दार्थ :** १. काळजींत मग्न असे, २. हजारपट, ३. पराक्रमी, ४. सातमजली, ५. राजवाडा, ६. मनोरा,

लंकाजन॥ वानरसैन्यसमुदावो॥७८॥ समुद्रतटीं लंकानिकटीं। दाटली वानरांची थाटी। सुवेळेपुढें वानरदाटी। रिती सृष्टी दिसेना॥७९॥ लंकेसभोंवता वेढा। वानरीं घातला गाढा[१]। सरों नये मागां पुढां। हुडोहुंडां[२] वानर॥८०॥ मुंग्या झोंबतीं गुळासीं। तेंवी वानर लंकेच्या चौपासीं। झोंबताती अति आवेशीं। रावणासी लक्षूनी॥८१॥ वानरीं कोंदलें जळ स्थळ। वानरीं कोंदलें कुलाचळ। दशदिशा गोळांगूळ। नभीं कपिकुळ कोंदलें॥८२॥ अति साक्षेपें पाहतां वानरसेना। दृष्टी टणकली दशानना। मूर्च्छा आली विसां नयनां। वानरसेना असंख्य॥८३॥ पाहतां वानरसेना गाढी। दृष्टि मागली बापुडी। पडली डोळियां झांपडी। रिती सवडी दिसेना॥८४॥ वानरसेना देखोनि दृष्टीं। लंकेमाजी बोंब उठी। अति विस्मय दशकंठीं। राक्षसकोटी किलकिलिती॥८५॥ वानरसेना अपरिमित। पाहतां रावण तटस्थ। घरोघरीं अति आकांत। चळीं कापत राक्षस॥८६॥

**रावणाच्या छत्राची छाया पडलेली बिभीषणाने पाहून ती श्रीरामांना दाखविली :** दहाही छत्रें रावणशिसीं। छाया पडली कपिकटकासीं। श्रीराम पुसे बिभीषणासी। अभ्रें कायसीं अकाळीं॥८७॥ बिभीषण म्हणे रघुनाथ। तुझा शत्रु सेना पाहत। त्याचे छत्रांची येथ। छाया पडत समस्तांवरी॥८८॥ ऐकोनि बिभीषणाचें वचन। कोपा चढला रघुनंदन। सज्जोनियां धनुष्यबाण। काय आपण बोलत॥८९॥

**रामांचे शरसंधान व रावणाचे छत्र दुभंगिले :** शत्रुछाया सैन्यावरी। हे तंव मज लज्जा भारी। रागें धनुष्य सज्जोनि करीं। बाण सांवरी साटोपें[३]॥९०॥

रामः श्यामः कमलनयनस्तत्र धन्वी सरोषं। लंकां पश्यन्भ्रमयति शरं पाणिना दक्षिणेन॥२९॥

नवजलदघनतन[४]। कांसें पीतांबर विराजमान। श्रीराम राजीवलोचन। बाहु आजानु[५] सांगद॥९१॥ मुकुट कुंडलें वनमाळा। कंठीं पदक कटीं मेखळा। तोडर गर्जे चरणकमळां। तेणें कळिकाळा अति धाक॥९२॥ वीरकंकणें करीं मुद्रिका। दशावतारी सुरेख टीका। धनुष्य सज्जोनियां देखा। पाहे लंका सरोष॥९३॥ दक्षिण करीं भ्रमे बाण। जीवें मारावया रावण। दुश्चिता मारूं नये आपण। छत्रच्छेदन करावें॥९४॥

**श्रीरामांच्या अचुक शरसंधानाने रावण मोहितः** चमत्कारें सोडूनि बाण। दहाही छत्रें पैं छेदून। लंकेबाहेर पडोन। शर परतोन रिघे भातां॥९५॥ देखोनियां छत्रसंपात। रिपुगुणा रिझला[६] लंकानाथ। परम धार्मिक श्रीरघुनाथ। शिरसंपात न करीचि॥९६॥

संमतीचे वाक्यः शत्रोरपि गुणा गाह्या :

**त्याचा रावणावर झालेला गंभीर परिणाम :** जेणें छेदिलीं दाही छत्रें। तो क्षणें छेदिता दहाही शिरें। अधर्मा न करिजे रघुवीरें। दशशिरें गुण घेइजे॥९७॥ गुणा रिझतां दशानन। प्रहस्त बोलिला प्रधान। दुसरा सुटलिया बाण। करील कंदन लंकेशा॥९८॥ ऐकोनि प्रहस्ताचें वचन। श्रीरामाच्या बाणाभेण। रावण गेला पळोन। अचुक मरण चुकविलें॥९९॥ अचुकसंधानी श्रीरघुनाथ। लक्ष भेदोनि जेथींचा तेथ। बाण परतोनि भातां येत। अत्यद्भुत धनुर्वाडा[७]॥१००॥ मूळींच झालें छत्रच्छेदन। हाचि मुख्य अपशकुन। रणीं मरेल रावण। लंकाजन जल्पती॥१॥ श्रीरामाच्या अनुसंधानां । देखोनि वानरांची सेना। कल्पांत मांडला दशानना। छत्रभंजन अपशकुन॥२॥ एका जनार्दना शरण। पुढें गोड निरुपण। कपट करील रावण। त्यांचें निर्दळण श्रीरामें॥३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणें युद्धकांडे एकाकारटीकायां रावणच्छत्रभंगो नाम द्वितीयोऽध्यायः॥२॥ ओंव्या॥ १०३॥ श्लोक॥२९॥ एवं॥ १३२॥

**शब्दार्थ :** १. मोठा, २. प्रत्येक बुरुजावर, ३. आवेशानें, ४. नूतन मेघाप्रमाणे नीलवर्ण, ५. गुडघ्यांपर्यंत ६. मोहित झाला. ७. धनुर्विद्येत निष्णात.

# अध्याय तिसरा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्रायनम: ॥

## रामांच्या मायवी शिराने सीतेचा छळ

प्रारंभी झालेल्या अपशकुनाने रावण उद्विग्न : साधावया रणांगण। मुळींच रावणा अपशकुन। श्रीरामें केलें छत्रभंजन। अति उद्विग्न[१] लंकेश॥१॥

विसर्जयित्वा सचिवान्प्रविवेश स्वामालयम्। ततो राक्षसमादाय विद्युज्जिव्हं महाबलम्॥१॥
मायाविनं महाघोरमब्रवीद्राक्षसाधिपः। मोहयिष्यामहे सीतां मायया जनकात्मजाम्॥२॥
शिरो मायामयं गृह्य राघवस्य निशाचर। मां त्वं समुपतिष्ठस्व महच्च सशरं धनुः॥३॥
एवमुक्तस्तथेत्याह विद्युज्जिह्वो निशाचरः। तस्य तुष्टोऽभवद्राजा प्रददौ चास्य भूषणम्॥४॥

छत्रभंगाचा अपशकुन। तेणें उद्विग्न रावण। विसर्जूनियां[२] प्रधान। आला आपण निजधामा॥२॥ सबळ बळें श्रीरघुनाथा। वानरसैन्य असंख्यातता। काय म्यां करावें आतां। प्रबळ चिंता लंकेशा॥३॥

रावणाचे विचार : बळेंचि जानकी भोगूं जातां। मजपरीस सबळ सीता। ते करूं शके माझ्या घाता। मज मारितां ते नये॥४॥ श्रीरामसेवाअनुवृत्तीं[३]। जन्ममरणाहूनि परती। स्वये सीतेची नित्य वस्ती। सीता निश्चितीं न मारवे॥५॥ करितां श्रीरामनामस्मरण। तेणें ये मरणासीच मरण। तिसीं न चाले मारकपण। सीता संपूर्ण विदेही॥६॥ करितां श्रीरामनामस्मरण। उठोनि पळे जन्ममरण। तिसीं न चाले मारकपण। सीता संपूर्ण विदेही॥७॥ भोगितां न भोगवे सीता। न मारवे मारूं जातां। रणीं न जिंकवे रघुनाथा। काय मीं आतां करावें॥८॥ रणीं मारिल्या रघुनाथा। वश्य होय जनकदुहिता। श्रीराम न मारवे सर्वथा। छळणे[४] सीता वश्य करूं॥९॥

विद्युज्जिव्ह राक्षसाला सीतेला छळण्याचा आदेश : स्वयें कपटी रावण। विद्युज्जिव्ह कपटी पूर्ण। करावया सीताछळण। त्यासी आपण गुज सांगे॥१०॥ करावया सीतेचें छळण। श्रीरामाचें शिर संपूर्ण। मायिक करावें आपण। धनुष्यबाण समवेत॥११॥ विद्युज्जिव्ह म्हणे आपण। शीघ्र शिर करीन निर्माण। त्यासीं संतोषोनि रावण। करकंकण[५] अर्पित॥१२॥

तो विश्वकर्म्याकडे जातो : मायिक शिर रघुनाथा। करितां न करवे सर्वथा। विद्युज्जिव्हां परम चिंता। काय लंकानाथा मुख दाखवूं॥१३॥ मायिक करिता रामशिर। मोडलें मुंडलें[६] हातियेर। जवा[७] न बैसें कोरेकोर। मायिक शिर न करवे॥१४॥ श्रीराम नव्हे पैं रंगिक। रंगें वोरंगले[८] सकळिक। विद्युज्जिव्हासी परम दुःख। दशमुख क्षोभेल॥१५॥ माया जाणोनि समस्ता। माव न चले श्रीरघुनाथा। विद्युज्जिव्हासीं परम चिंता। काय म्या आतां करावें॥१६॥ माया नाहीं श्रीरामासीं। मायिक शिर न घडवे त्यासीं। विद्युज्जिव्ह कासाविसी। विश्वकर्म्यापासीं मग गेला॥१७॥

त्याला विश्वकर्म्याचे उत्तर : चरण वंदोनियां त्याचे। मायिक शिर श्रीरामाचें। करोनि द्यावें निश्चयाचे। ऐसें वाचे अनुवादे॥१८॥ विश्वकर्मा वदे साचें। मायिक शिर श्रीरामाचें। म्हणता कुष्ठ लागे वाचे। कुळनाशाचें निजमूळ॥१९॥ जेथें कपट तेथे तळपट। वेदानुवाद घडघडाट। भ्रमें भुलला दशकंठ। मरेल स्पष्ट कुळेंसीं॥२०॥ श्रीराम सत्याचें निजसत्य। माया केवळ मिथ्याभूत। त्याचें मायिक शिर येथ। मज निश्चित न करवे॥२१॥ तुमचे

शब्दार्थ : १. दुःखी, कष्टी २. रजा देऊन, ३. (सतत) रामसेवा, ४. कपटाने, ५. हातांतील सुवर्णकंकण, ६. बोथड झाले. ७. सांधा, ८. आच्छादित झाले.

निदान[1] आलें गाढें। यालागीं कपट मांडलें कुडें। कपट न चले सीतेपुढें। रणीं रोकडें मराल ॥२२॥ ऐसें ऐकतां वचन। विद्युज्जिव्ह करी रुदन। श्रीरामशिर न नेतां जाण। दशानन मारील ॥२३॥ रावणा सीतासन्निपात। न कळे स्वार्थ ना परमार्थ। अवश्य करील माझा घात। तो अनर्थ चुकवावा ॥२४॥ दांतीं धरोनि अंगुठे जाण। मस्तकीं धरिले दृढ चरण। तुझा शिष्य मी पुरातन। माझे प्राण वांचवीं ॥२५॥ मायिक विद्येची व्युत्पत्ती। तुजपासून मज प्राप्ती। तेचि न चले श्रीरामाप्रती। कृपामूर्ति वांचवीं ॥२६॥ पुढती धरिले दृढ चरण। घालोनियां लोटांगण। विश्वकर्मा पैं आपण। कृपेनें पूर्ण कळवळला ॥२७॥

विश्वकर्मा ध्यानयोगाने काल्पनिक रामशिर त्याला देतो : संतचरणरज वंदून। ब्राह्मणचरणतीर्थ प्राशून। विश्वकर्मा स्वयें आपण। श्रीरामध्यान आरंभी ॥२८॥ जैं ब्राह्मणपदरज वंदिती। तैं सकळ संपत्तीची अवाप्ती[2]। समस्त निर्दळती आपत्ती। श्रीराममूर्ति स्वयें भेटे ॥२९॥ ब्राह्मणचरण[3]रजोमहिमान। जे जे वांछिल अर्थ संपूर्ण। भुक्ति मुक्ति त्यांपाशीं आंदण। सुप्रसन्न श्रीराम ॥३०॥ विश्वकर्म्याची ध्यानस्थिती। प्रकटली श्रीराममूर्ती। मायिक शिराची पैं प्राप्ती। वरदोक्ती स्वयें मागत ॥३१॥ विश्वकर्म्याची ध्यानमूर्ती। आनुवदे तयाप्रती। तुझी मागणी वरदोक्ती। कठिण प्राप्ती ते आइक ॥३२॥ शिर न ये करणी करितां। शिर न घडे स्वचें घडितां। काल्पनिक शिरःसंस्था। निजवरदार्था मी देईन ॥३३॥ आरसां बिंबे प्रतिवदन। रूपरेखा समसमान। तैसें कल्पित शिर संपूर्ण। समयीं जाण पावशील ॥३४॥ जेव्हा मागेल रावण। विद्युज्जिव्ह तेव्हाची जाण। काल्पनिक शिर संपूर्ण। स्वयें आपण पावेल ॥३५॥ आदर्शांत[4] प्रतिमुख दिसे। परी तें तयामाजि नसे। मनःकल्पित शिर तैसें। अनायासें पावसी ॥३६॥ तेही शिर अचेतन। आणिक कल्पित धनुष्यबाण। समयीं पावेल जाण। ऐसें वरदान पावला ॥३७॥ ऐसें लाहोनि वरदान। विद्युज्जिव्ह येतांचि जाण। अशोकवना निघे रावण। अति संपर्णू साटोपें ॥३८॥

> अशोकवनिकायां च सीतादर्शनलालसः। नैर्ऋतानामधिपतिः संविवेश महाबलः ॥५॥
> ततो दीनामदीनां तां ददर्श धनदानुजः। अधोमुखीं शोकपरामुपविष्टां महीतले ॥६॥
> भर्तारमनुध्यायंतीमशोकवनिकां गताम्। उपसृत्य ततः सीतां प्रहृष्टेनांतरात्मना ॥७॥
> इदं च वचनं धृष्टमुवाच जनकात्मजाम् । सांत्वमाना मया भद्रे यमाश्रित्य विमन्यसे ॥८॥
> खरहंता स ते भर्ता राघवः समरे हतः। छिन्नं ते सर्वथा मूलं दर्पश्च निहतो मया ॥९॥
> व्यसनेनात्मनः सीते मम भार्या भविष्यसि। विसृजैतां मतिं मूढे किं मृतेन करिष्यसि ॥१०॥

ते रामांचे मस्तक घेऊन रावण अशोकवनात जातो : क्रीत हिरखाचा[5] गजर। अशोकवना अति सत्वर। स्वयें आला दशशिर। सीता सुंदर प्रलोभावया ॥३९॥ बाह्य मळीं दिग्ध दिसे दीन। अंतरीं सुखैकश्रीरामध्यान। सीता देखोनि दशानन। काय आपण जल्पत ॥४०॥ श्रीरामबळाच्या अभिनिवेशीं[6]। माझें वचन उपेक्षिसी। रामवाढीव[7] अहर्निशीं। प्रजल्पसी[8] सर्वदा ॥४१॥

रावण सीतेला ते शिर दाखवितो : मारिला म्हणसी त्रिशिरा खर। ऐसा बळिया श्रीरामचंद्र। मारुन आला इंद्रजित कुमर। आणिलें शिर रामाचें ॥४२॥ माझा राम शूर श्रेष्ठ। माझा राम वीर सुभट[9]। राम वानिसी रणश्रेष्ठ। मज फोलकट मानिसी ॥४३॥ ज्याचें धरोनियां बळ।

शब्दार्थ : १. अंत, नाश, २. प्राप्ती, ३. ब्राह्मणाच्या चरणधूळीचा महिमा, ४. आरशांत, ५. आनंदाचा, ६. दुराग्रहामुळे, ७. रामाचा मोठेपणा, ८. बोलतेस, ९. मोठा योद्धा.

मजसीं सदा चालविसी सळ। तो म्यां केलासे निर्मूळ। वरीं तत्काळ मजलागीं ।।४४।। रणीं मारिलें रघुनाथा। आतां कोण सोडवील सीता। त्याची सांडोनि चिंता वार्ता। वरीं मज लंकानाथा उल्लासें ।।४५।। गर्वें म्हणसी पतिव्रता। ते तूं आतुडसी[1] लंकानाथा। तुज मी न सोडीं सर्वथा। उल्लसतां[2] वरीं मज ।।४६।। आता रावण न वरितां। तुज तंव गति नाहीं अन्यथा। सांडोनियां अति मूखर्ता। होय तूं कांता लंकेशा ।।४७।। रणीं मारिले रामलक्ष्मण। निर्दळिले वानरगण[3]। आतां तुझा आग्रह कोण। करीं रावण प्रियभर्ता ।।४८।। श्रीराम पडलिया रणीं। सौमित्रेंसहित वानरश्रेणी। भेरी त्राहाटिल्या निशाणीं। रावणा राणी सती सीता ।।४९।।

रावणाची सीतेजवळ प्रौढी : ऐकोनि श्रीराममरण। सीते न करिसी रुदन। मिथ्या म्हणसी माझें वचन। रणकंदन तें ऐकें ।।५०।। ऐसे रावण जल्पतां। कांहीं न बोले सती सीता। समूळ जाणे मिथ्या वार्ता। श्रीरघुनाथाचेनि धर्में ।।५१।। घाला घालोनि इंद्रजित। रणीं मारिला रघुनाथ। सत्य न मानिसी माझी मात। रणवृत्तांत तो ऐक ।।५२।।

श्रुणु भर्तृवधं सीता घोरं वृत्रवधं यथा । बलेन महता रामो व्रजस्तस्तं दिवाकरे ।।११।।
सन्निविष्टः समुद्रस्य तीरमासाद्य चोत्तरम् । अथाध्वनि परिश्रांतमर्धरात्रे स्थितं बलम् ।।१२।।
सुखसुप्तं तमासाद्य चारितं प्रथमं चरैः। तत्प्रहस्तप्रणीतेन बलेन महता मम ।।१३।।
बलमस्य हतं रात्रौ यत्र रामः सलक्ष्मणः। पट्टिशान्परिघांश्चक्राण्यृष्टीर्दंडान्महायुधान् ।।१४।।
उद्यम्योद्यम्य रक्षोभिर्वानरेषु निपातिताः । अथ सुप्तस्य रामस्य प्रहस्तेन प्रमाथिना ।।१५।।
असक्तं कृतहस्तेन शिरश्छिन्नं महासिना ।।१६।।

जेंवी इंद्र वधी वृत्रासुरासी। तेंवी राक्षसीं वधिलें श्रीरामासी। भ्रतार वधिला कोणे प्रदेशीं। तेंहि तुजपासीं सांगेन ।।५३।। सेतु बांधोनि सागरीं। वानरभार निजगजरीं। ऐसा राम समुद्राच्या पारीं। दक्षिणतीरीं राहिला ।।५४।। जंव जाला अस्तमान। मार्गीं भागिले वानरगण। अवघीं केलें सुखें शयन। रामलक्ष्मणसमवेत ।।५५।। बिभीषणाचें भय दारुण। तोही जाला निद्रापन्न। ऐसी पाळती[4] आणोन पूर्ण। निघे प्रधान प्रहस्त ।।५६।। ससैन्य इंद्रजित प्रहस्त। घाला घातला रातोरात। निद्रिस्थ मारिला रघुनाथ । समवेत सौमित्र ।।५७।। सुग्रीवादि वानरसैन्य। मध्यरात्रीं निद्रापन्न। प्रहस्तें घाला घालोन। रणकंदन तें केलें ।।५८।। फरश पट्टिश तोमर। गदा मुद्गल बाण चक्र। पाचारोनिंया वानर। रणीं समग्र मारिले ।।५९।। निष्ठुर ग्रहस्ताचे कर। छेदोनि श्रीरामाचें शिर। येथें आणिलें वो साचार। तुझा भ्रतार मारूनी ।।६०।। श्रीरामाचें धुनष्यबाण। राम मारोनि आणिलें जाण। ऐसें सांगतां दशानन। सीता रुदन करीना ।।६१।। रणीं मारिला श्रीरामचंद्र। सत्य न मानी सीता सुंदर। तेणें क्षोभोनि दशशिर। वीरमहामार सांगत ।।६२।। राम लक्ष्मण निद्रितां घात। सुग्रीवाचा ग्रीवापात[5]। आघातें मरे हनुमंत। जांबवंत कटिभंगे ।।६३।। करोनियां जानुविहीनु। रणीं पाडिला इंद्रजानु। शूळें विदारिला सुषेणु। गंधामादनु पट्टिशें ।।६४।। वर्षोनियां बाणजाळ। रणीं पाडिले नळ नीळ। मैंद द्विविद प्रबळ। छेदिलें कपाळ असिधारा[6] ।।६५।। तार तरळ गवय गवाक्ष। कुमुद महावीर देख। पांचही मारिले निःशेख। शस्त्रें अनेक वर्षोनी ।।६६।। पिकोनियां फणस झडे। तेवी पनसाचें शिर पडे। वानर वीर अति गाढे। रणीं रोकडे वारिले ।।६७।। हरिमुख दधिमुख। सुमुख आणि दुर्मुख। रणीं वानरांचें कटक। एक एक मारिलें ।।६८।। बाहु भेदोनि सहस्कंध। रणीं पाडिला अंगद। रात्रीं निशाचर प्रबुद्ध[7]। रणविमर्द[8] वानरां ।।६९।। अश्व रगडिले एक एक। गज मर्दिले

शब्दार्थ : १. प्राप्त होशील, २. आनंदाने, ३. वानरसमुदाय, ४. शोध, माहिती, ५. मान मोडणे, ६. तलवारीच्या धारेने. ७. जागे, ८. रणकंदन.

अनेक। एवं वानरांचें कटक। रणीं निःशेख मारिलें ॥७०॥ दिवसा सबळ वानर। रात्रीं दुर्धर निशाचर। तिहीं करोनि रात्रीं मार। नर वानर रणीं मारिले ॥७१॥

एवं ते निहतो भर्ता ससैन्यो मम सेनया। क्षतजार्द्ररजोध्वस्तमिदं तस्याहृतं शिरः ॥१७॥
विद्युज्जिह्वस्तदा गृह्य शिरस्तस्याग्रतः स्थितः। तमब्रवीत्ततो राजा रावणो राक्षसं स्थितम् ॥१८॥
विद्युज्जिव्हं महाज्जिव्हं समीपपरिवर्तिनम्। अग्रतः कुरु सीतायाः शीघ्रं दाशरथेः शिरः ॥१९॥
एवमुक्तं तु तद्रक्षस्तच्छिरः प्रियदर्शनम् । पुरो निक्षिप्य सीतायाः क्षिप्रमंतरधीयत ॥२०॥
रावणश्चापि चिक्षेप भासुरं कार्मुकं तदा। त्रिपु लोकेषु विख्यातं रामस्य तदिति ब्रुवन् ॥२१॥

माझें सैन्य सेनानी निशाचर[१]। जावोनि रातोरातीं सत्वर। निजल्या जागीं मारोनि रघुवीर। त्याचें शिर आणिलें ॥७२॥ माझ्या वचनाची वचनोक्ती। सत्य न वाटे सीतेप्रती। हें घे शिर देतों हातीं। भेट निजपतीसीं स्वानंदें ॥७३॥ ऐकोनि रावणाची गोष्टी। सीता सज्ञान पैं मोठी। पालवीं[२] बांधिली शकुनगांठी। अचुक भेटी श्रीरामीं ॥७४॥ शत्रुमुखींचें वचन। वदविता राम चिद्धन। तुज भेटवितों रघुनंदन। राम परिपूर्ण भेटेल ॥७५॥ रावण बोले उपहासता[३]। शीघ्र भेटवीन रघुनाथा। तोही शकुन मानी सीता। छळणार्थता शिर दावी ॥७६॥ गर्जोनि बोले दशशिर। विद्युज्जिव्ह येईं शीघ्र। श्रीरामाचें शिर सुंदर। देई सत्वर सीतेसी ॥७७॥

**त्याचा सीतेवर झालेला अनुकूल परिणाम :** मायिक शिर सीतेसीं देतां। विद्युज्जिव्हा चळीं कंपता। रावण दंडील न देतां। अति भीतता देतसे ॥७८॥ मिथ्या शिर सीतेसी देतां। क्षोभें शापील पतिव्रता। विद्युज्जिव्हा भयभीतता। अदृश्यता पळाला ॥७९॥ मिथ्या जाणोनि श्रीरामशिर। तेथेंही सीता भजनतत्पर। स्वयें देखता दाशशिर। करी नमस्कार साष्टांग ॥८०॥ श्रीरामाचें धुनष्यबाण। देखोनियां सीता आपण। अनन्य घाली लोटांगण। स्वयें रावण देखतां ॥८१॥ श्रीरामशिर देखोनि छिन्न। सीता मिथ्या करी रुदन। रुदनामाजी महिमान। ऐके रावण तैसें गाय ॥८२॥ जन्ममरणापरता। नित्यवस्ति श्रीरघुनाथा। त्यासीं राक्षसीं केल्या घाता। केंवी सत्यतां घडे रामा ॥८३॥ निजबळें स्वयें खद्योत। सूर्याचा करी घात। तरी राक्षसीं रघुनाथ। रणाआंत न मारवे ॥८४॥ श्रीराम नित्य सावधान। जागृतिस्वप्न-सुषुप्तिविहीन। त्यासी निद्रिता राक्षसीं हनन। केलें हें वचन केंवी घडे ॥८५॥ धूमें धुरकटेना[४] आकाशशशी। तेंवी निद्रा न लागे श्रीरामासी। सुखावस्था वधिलें त्यासी। निश्चयेसीं केवीं मानू ॥८६॥ उदकीं असोनियां गगन। अंगीं न लागे ओलेपण। तेंवी श्रीराम द्वंद्वविहीन। त्यासी मरण केंवी मानूं ॥८७॥ पर्जन्यधारा समुद्रासीं। कदा न रुपती ज्याच्या त्यासी। तेंवी शस्त्रें श्रीरामासी। निजांगासीं न लागती ॥८८॥ उंदीर कराडूं शके चांदु। तरी श्रीरामा शिरच्छेदु। करूं न शके राक्षस मंदु। अबद्ध बोधु केंवी मानूं ॥८९॥

**हाही कपटी प्रयत्न व्यर्थ गेला म्हणून रावणाचा जळफळाट :** ऐसें श्रीरामपवाडे पढत। सीता उकसाबुकसीं स्फुंदत। तंव रावण चरफडत। सीता छळणार्था मानीना ॥९०॥ स्वयंवरीं वाहतां त्र्यंबक[५]। केलें रावणाचें काळें मुख। त्या रामाचें प्रचंड धनुष्य[६]। कोण मशक आणूं शके ॥९१॥ श्रीरामाचा निजबाण। रणीं करूनि रिपुमर्दन। स्वयें भातां रिघे परतोन। वेगळा कोण करूं शके ॥९२॥ ऐकतां सीतचे रुदन। ललाट पिटी दशानन। सर्वथा सीतेसीं न चले छळण। तळमळी पूर्ण अभिलाषें ॥९३॥ तळमळितां दशानन। तंव झालें आनेआन। श्रीरामशिराचें परिज्ञान। पाहे सुचिन्ह जानकी ॥९४॥

---

शब्दार्थ : १. सेनापति, २. पदरीं, ३. उपहासपूर्वक, ४. मळेना, ५. कुरतडूं शके, ६. शिवधनुष्य.

सा सीता तच्छिरो दृष्ट्वा तच्च कार्मुकमुत्तमम् । नयने मुखवर्णं च भर्तुस्तत्सदृशं भवेत् ॥२२॥
अंतर्धानं च तच्छीर्षं तच्च कार्मुकमुत्तमम् । जगाम रावणस्यैव निर्याणसमनंतरम् ॥२३॥

सादरें पाहे सीता सुंदर। श्रीरामासारिखें शिर। परी रामाचें नव्हे साचार। वदे गंभीरं श्लोकपद ॥९५॥ श्लोकपद अति सुरस। श्रीरामशिरेंसीं सादृश्य। हाचि पदगर्भविलास। जाणें अनायासें जानकी ॥९६॥ श्लोकपदगर्भ गंभीर। श्रीरामशिरासारिखें शिर। रघुनाथाचें नव्हे साचार। सीता सुंदर स्वयें जाणे ॥९७॥ नेत्र वक्त्र[1] श्रवण घ्राण[2]। ओष्ठ वदन भंवया दर्शन[3]। श्रीराममुखासीं समान। केलें आनेआन कृत्रिम ॥९८॥

सीता घाबरली नाही : मिथ्या देखोनि श्रीरामघाता। गजबजिली नाहीं सती सीता। राक्षसां न मारवे रघुनाथा। समूळ कथा अवधारा ॥९९॥ शस्त्रें सतेज सज्जून। सर्वथा न छेदवे गगन। तेंवी श्रीरामशिरच्छेदन। राक्षसां जाण न करवे ॥१००॥ शस्त्र करांडितां दुधार। मुखच्छेदें मरे उंदीर। राक्षसां न छेदवे श्रीरामशिर। रामें निशाचर मरतील ॥१॥ सर्वही रस चाखे माशी। दीप चाखितां पोळे मुखासीं। राम न मारवे राक्षसांसी। श्रीराम त्यांसी प्राणांत ॥२॥

सीतेच्या नजरेपुढून ते शिर अदृश्य झाले : कृत्रिमशिर रघुनाथा । घडितां न घडवे सर्वथा। सादर पाहूं जाता सीता। अदृश्यता उडालें ॥३॥ शिर देवोनियां सीतेच्या करीं। विद्युज्जिव्ह पळे बाहेरी। सीता पाहतां शिर निर्धारीं। क्षणामाझारीं अदृश्य ॥४॥ थिल्लरीं[4] सूर्य बिंबला पाहीं। काढूं जातां तो तेथें नाहीं। कल्पित शिराची नवायी। ठायींच्या ठायीं अदृश्य ॥५॥ कल्पित शिरेसीं धनुष्यबाण। सीतेनें पाहतां निर्धारून। अदृश्यगती गेलें उडोन। सत्य संपूर्ण तें नव्हे ॥६॥ सीतेचिये दृष्टीपुढें। सर्वथा राहों न शके कुडें। मिथ्यात्वें तें समूळ उडे। मागें पुढें श्रीराम ॥७॥ सीतासतीचा भजनानुक्रम। नयनीं राम वदनीं राम। शयनीं राम जीवनीं राम। तीपुढें भ्रम केंवी राहे ॥८॥ स्मरणीं राम करणीं राम। पंचभूतेंसीं धरीणीं राम। क्षराक्षरेंसीं वाणीं राम। तीपुढें भ्रम केंवी राहे ॥९॥ कर्मी राम धर्मी राम। आश्रम विश्राम स्वयें राम। सदा स्वधर्मी श्रीराम। तीपुढें भ्रम केंवी राहें ॥११०॥ गति श्रीराम स्थिति श्रीराम। वृत्ति श्रीराम धृति श्रीराम। सर्वा भूतीं सदा श्रीराम। तीपुढें भ्रम केंवी राहे ॥११॥ ऐसियापरी सीता सती। विनटली[5] श्रीरामभक्ती। तिसीं न चले छळणोक्ती। लंकापति अति मुर्ख ॥१२॥

एतस्मिन्नंतरे द्वाःस्थो रावणाय न्यवेदयत्। कार्यमात्यंतिकं घोरं सज्ञया भ्रांतलोचनः ॥२४॥

त्याच वेळी द्वारपाळ श्रीरामांच्या आक्रमणाची वार्ता आणतो : तेचि समयीं अति विव्हळ। उत्तरद्वारींचा द्वारपाळ। रावणेंसीं बोले बरळ। नेत्रीं विव्हळ भयभीत ॥१३॥ सपरिवार वानरगण। लावोनियां भेरी निशाण। लंकें आलें रामलक्ष्मण। दुर्धर बाण सज्जूनी ॥१४॥ विध्वंसूनि लंकाभुवन। राक्षसांसी करूनि कंदन। वधावया दशानन। दोघे जण स्वयें आले ॥१५॥ अजूनि काय सीतेंसी छळ। संग्रामासीं नीघ तत्काळ। नातरी देवोनि जनकबाळ। शरण केवळ रिघे रामा ॥१६॥ द्वारपाळें रावणापासीं। गोष्टी सांगतांचि ऐसी। छळण सांडोनि सीतेसीं। निजसभेसीं स्वयें आला ॥१७॥

सीतां तु मोहितां ज्ञात्वा सरमा नाम राक्षसी। तां समाश्वासयामास सखीस्नेहेन सुव्रताम् ॥२५॥
न हतो राघवः सीते श्रीमान् शत्रुनिबर्हणः। रावणेन नृशंसेन माया मायाविना कृता ॥२६॥

सरमा सीतेला धीर व आश्वासन देते : रावणें ठेविली राखण। सरमा नामें राक्षसी जाण।

शब्दार्थ : १. तोंड, २. नाक, ३. दांत, ४. डबक्यांतील पाण्यांत, ५. मिळून गेली.

तिसीं सीतेसीं आप्तपण। मैत्री पूर्ण सदाकाळीं ॥१८॥ रावणें सीतेसीं केलें छळण। ऐसें जाणोनि संपूर्ण। सरमा तिसी आपण। आश्वासून[1] अनुवादे ॥१९॥ तुज छळावया येथ। मिथ्यावादी लंकानाथ। नाहीं वधिला रघुनाथ। होईं तू स्वस्थ जानकिये ॥१२०॥ सरमा वदे जाणोनि पूर्ण। स्वस्थ श्रीराम लक्ष्मण। स्वस्थ लाडका हनुमान। वानरगण स्वस्थ सुखी ॥२१॥ तुझें करावया छळण। मायिक शिर धुनष्यबाण। रावणें दाखविलें जाण। कपटी पूर्ण महापापी ॥२२॥ श्रीरामेंसहित कपिकटक[2]। अंगद सुग्रीवादि देख। वधावया दशमुख। लंकेसंमुख स्वयें आले ॥२३॥ पैल पाहें वानरभार। करीत आले गडगजर। ऐकोनि सरमेचें उत्तर। सुखनिर्भर[3] जानकी ॥२४॥ सीतेनें देवोनि आलिंगन। हर्षे दिधलें करकंकण। एका जनार्दना शरण। समाधान श्रीरामें ॥२५॥ श्रीरामें सुखसंपत्ती। श्रीरामें सुखैकप्राप्ती। श्रीरामें सीता सती। छळणार्थी छळेना ॥१२६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां जानकीच्छलनं कपटशिरोदर्शनं नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥ ओंव्या ॥१२६॥ श्लोक॥ २६॥ एवं॥ १५२॥

## अध्याय चौथा

॥ श्रीसद्‌गुरवेरामचंद्रायनमः॥

### राक्षस - वानरांचे युद्ध

लगबगीने रावण सभेत येतो. त्याची बिकट अवस्था : प्रबळ बळें रघुनंदन। आला ऐकोनि रावण। अतिशयें चिंतानिमग्न[4]। म्लानवदन सभेसीं ॥१॥

> तेन शंखविमिश्रेण भेरीशब्देन रावणः। मुहूर्तं ध्यानमास्थाय सचिवानभ्युदैक्षत ॥१॥
> ततस्तु सुमहाप्राज्ञो माल्यवान्नाम राक्षसः। उवाच रावणं मंत्री कृतबुद्धिर्बहुश्रुतः ॥२॥
> तन्मह्यं रोचते संधिः सह रामेण रावण। यदर्थमभियुक्तोसि सीता तस्मै प्रदीयताम् ॥३॥
> तस्य देवर्षयः सर्वे गंधर्वाश्च जयैषिणः। विरोधं मा गमस्तेन रामेणाभिततेजसा ॥४॥

सभे संचित दशानन। तंव शंख भेरी ढोल निशाण। श्रीरामकटकीं त्राहाटिले पूर्ण। तेणें रावण गजबजिला[5] ॥२॥ ऐकोनि वाजंत्रांचा गजर। त्यामाजी वानरांचा भुभुःकार। तेणें दचकला दशशिर। मुहूर्तमात्र तटस्थ ॥३॥ कार्यकारणकर्तव्यता। काहीं नाठवे लंकानाथा। तेव्हा माल्यवंत जाला बोलता। निजहितार्था शिकवाया ॥४॥

माल्यवानाचे दुश्चिन्हकथन : रावणाचा परम आप्त। वृद्ध राक्षस माल्यवंत। बहुश्रुतत्त्वें[6] बुद्धिवंत। धर्मी धर्मवंत सुनीति ॥५॥ ऐकें ऐक लंकानाथ। दिवी[7] भुवि अंतरिक्षांत। त्रिविध उत्पातीं लंकाव्याप्त॥ आला कुळघात राक्षसां ॥६॥ मध्यान्हीं उल्कापात[8]। राजद्वारी भूस्फोट[9] होत। दिवाभीतें[10] घराआंत। बळेंचि रिघत झडपोनी ॥७॥ रुधिरवृष्टी[11] होत नागरीं। गोमायु[12] गर्जती चौबारीं। भाणीं[13] झडपोनि नेती घारी। आली महामारी राक्षसां ॥८॥

त्याची गंभीर सूचना : यालागीं ऐक लंकानाथा। सीता अर्पूनि रघुनाथा। रामरावणां अतिसख्यता। करीं सर्वथा क्षणार्धे ॥९॥ येथें कलहाचें कारण। मुख्यत्वे सीताचि जाण। ते केलिया रामार्पण। कृतकल्याण सर्वांसी ॥१०॥ श्रीरामाची निजकांता। रामार्पण करितां

शब्दार्थ : १. धीर देऊन, २. वानरसैन्य, ३. हर्षयुक्त, सुखाने परिपूर्ण, ४. चिंतातुर, ५. भ्याला, ६. ज्ञानाने, ७. स्वर्गी, ८. विजा पडणे, ९. पृथ्वीला खळगे, १०. [illegible], ११. रक्तस्राव, १२. कोल्हे, १३. अन्नपात्रे.

सीता। रावणा तुज कां व्यर्थ व्यथा। हेचिं कुळघाता निजमूळ॥११॥ श्रीरामाचा प्रताप पूर्ण। समुद्रीं तारिले पाषाण। लंके आणिलें वानरसैन्य। त्यासंमुख कोण राहूं शके॥१२॥ गजापुढें[१] मशक जाण। सिंहापुढें भुंके श्वान[२]। तेंवीं श्रीरामीं रावण। करितां रण निमेल॥१३॥ सूर्यासीं करावया रण। उठावले घृतकण। तैसा श्रीरामीं रावण। मरेल पूर्ण रणरंगीं॥१४॥ पतंग अग्नीसीं झगडा। करूं पाहे पंखझडाडा। तेंवीं रावण रामापुढां। मरेल रोकडा बाणें एकें॥१५॥ धरोनिया शहाणपणा। सुबुद्धि ऐकावी रावणा। सीता अर्पूनि रघुनंदना। कुळकल्याणा साधावें॥१६॥

तत्तु माल्यवतो वाक्यं हितमुक्तं दशाननः। न मर्षयति दुष्टात्मा कालस्य वशमागतः॥५॥
अमर्षात्परिवृत्ताक्षो माल्यवंतमथाब्रवीत्। मानुषं कृपणं राममेकं शाखामृगाश्रयम्॥६॥
समर्थ मन्यसे केन त्यक्तं पित्रा वनाश्रयम्। वीरद्वेषेण वा शंके पक्षपातेन वा रिपोः॥७॥
एवं ब्रुवाणं संरब्धं क्रुद्धं विज्ञाय रावणम्। व्रीडितो माल्यवांस्तूर्णं तस्माद्देशादपाक्रमत्॥८॥

रावणाने माल्यवानाचा केलेला धिक्कार : क्षीर ज्वरिता कडू विख। तेंवी हितवाक्य दशमुख। मोल्यवंताचें न मानूनी सुख। परम दुःख पावला॥१७॥ परम क्रोधें दशकंठ। वटारूनि नेत्रवाट। स्वामिनिंदक तूं अति दुष्ट। शठ नष्ट माल्यवंता॥१८॥ राम बापुडें मनुष्यमात्र। घेवोनि आलें वानरभार। त्यासीं वानिसी थोर थोर। मी राज्यधर मज निंदिसी॥१९॥ शत्रुपक्षाचा अभिमान। वानिसी श्रीराममहिमान। निखंदिसी[३] दशानन। कुळनिर्दळण श्रीरामें॥२०॥ श्रीरामासीं करितां रण। रणीं राक्षसां निर्दळण। मुख्य मरेल रावण। ऐसें कठिण वदतोसी॥२१॥ तुवां भेडसाविल्या जाण। मज रामाचें भय कोण। रणीं मारीन राम-लक्ष्मण। वानरगणसमवेत॥२२॥ विरुद्ध अनुवादतां येथ। तुझा करावा म्यां घात। अति वृद्ध परम आप्त। म्हणोनि हात राखिला॥२३॥

त्यामुळे माल्यवान निघून जातो : कोपला देखोनि दशवदन। माल्यवंत स्वयें सरकोन। सत्वर गेला पैं निघोन। मुख परतोन पाहेना॥२४॥ सीता अर्पावी रघुनाथा। ऐसें माल्यवंत सांगतां। रावण करूं पाहे घाता। तो अदृश्यता फडकला॥२५॥ माल्यवंत गेलिया जाण। प्रधाना सांगे रावण। दुर्ग[४] सज्जून दारुण। वीरीं सावधान राहावें॥२६॥

लंकायास्तु तदा गुप्तिं कारयामास राक्षसः। प्रहस्तं व्यादिदेशाथ पूर्वद्वारे निषूदनम्॥९॥
दक्षिणे तु महावीर्यौ महापार्श्वमहोदरौ। पश्चिमे तु तथा द्वारे पुत्रमिंद्रजितं तदा॥१०॥
उत्तरे चापि स द्वारे व्यादिश्य शुकसारणौ। स्वयमत्र भविष्येहमिति तान्मंत्रिणोऽब्रवीत्॥११॥
राक्षसं तु विरूपाक्षं महाबलपराक्रमम्। मध्ये संस्थापयामास बहुभिः सह राक्षसैः॥१२॥

रावणाचें सैन्यनियोजन : रावण करी दुर्गसंस्था[५]। पूर्वद्वारीं ठेवी प्रहस्ता। दक्षिणद्वारीं होय ठेविता। महोदर तथा महापार्श्व॥२७॥ पश्चिमद्वारींचा निर्धार। इंद्रजित ठेविला ज्येष्ठ कुमर। कोट्यनुकोटी निशाचर। सहपरिवार सहसैन्य॥२८॥ उत्तरद्वारीं पैं जाण। तेथें ठेविले शुकसारण। सहपरिवारें रावण। ते द्वारीं आपण स्वयें राहे॥२९॥ उत्तरद्वारी श्रीरघुनाथ। निश्चयें येईल येथ। यालागीं तेथें लंकानाथ। स्वये राहत सावधान॥३०॥ अमित सैन्य देवोनि त्यासी। मध्यगुल्मीं[६] ठेविलें विरुपाक्षासी। उणें देखावें ज्या द्वारासी। साह्य त्यासी तेणें जावें॥३१॥ देखोनियां लंकाभुवन। दुर्ग घ्यावया वानरगण। रामापासीं अवघे जण। कर जोडून राहिले॥३२॥ मिळोनियां वानरवीर। नमस्कारोनि रामचंद्र। आम्हांसी घ्यावया

शब्दार्थ : १. कुत्रा, २. निंदितोस, ३. किल्ले, ४. किल्ल्यांची व्यवस्था, ५. मध्यभागी.

लंकापुर। आज्ञा सत्वर दे स्वामी ॥३३॥ आज्ञा पुसतां जुप्तत्ती। बिभीषण श्रीरामाप्रती। सांगे दुर्गाची पाळती। प्रधानाहस्तीं जे आणविली ॥३४॥

अथ तेषु ब्रुवाणेषु रावणावरजोऽब्रवीत् । अनलः पनसश्चैव संपातिः प्रमतिस्तथा ॥१३॥
गत्वा लंकाममात्या मे पुरीं पुनरिहागताः। भूत्वा शकुनयः सर्वे प्रविष्टाश्च रिपोर्बलम् ॥१४॥
संविधानं यदाहुस्ते रावणस्य दुरात्मनः । राम ते ब्रुवतः सर्वं यथातथ्येन मे शृणु ॥१५॥

बिभीषण दुर्गरक्षणाची केलेली योजना सांगतो : लंका घ्यावया हातोहातीं। गर्जत उठतां वानरपंक्ती। बिभीषणे थांबवोनि जुत्पत्ती। दुर्गपाळती स्वयें सांगे ॥३५॥ करूं जातां रणकंदन। रणीं पडे पारखें[1] सैन्य। ऐसें दुर्गाचें विंदान। बिभीषण स्वयें सांगे ॥३६॥ यंत्रें[2] शतघ्नी[2] गुप्तगोळ। दारुयंत्रें[2] पाषाण प्रबळ। निर्दळावया पारिखें दळ। दुर्ग प्रगळ सज्जिले ॥३७॥ माझे चौघेही प्रधान। धांडोळोनि लंकाभुवन। दुर्गाचें मारक विंदान। पाळती पूर्ण घेवोनि आले ॥३८॥ तुझ्या चौघां प्रधानांसी। ओळखी सर्वत्र सर्वांसीं। पाळती आणिली कैसी। बिभीषणासी पुसे राम ॥३९॥ माझे चौघे प्रधान। ऐक त्यांचें नामाभिधान। अनळ हर प्रघस संपाती जाण। अति विचक्षण[3] कामरूपी[4] ॥४०॥ पक्षिवेषाचे अनुवृत्ती। रिघोनिया लंकेप्रती। तिहीं दुर्गाची पाळती। यथार्थगतीं आणिली ॥४१॥ पूर्वे प्रहस्त अति प्रसिद्ध। दक्षिणे महोदर माहापार्श्वद। पश्चिमे इंद्रजित अगाध। सन्नद्ध बद्ध सैन्येंसीं ॥४२॥ उत्तरद्वारीं शुकसारण। ठेविले नाममात्र जाण। सकळ सैन्येंसी आपण। राहे रावण ते द्वारीं ॥४३॥ सैन्यसमुदाय मध्यगुल्मासीं। अग्रगणी केलें विरूपाक्षासी। मोड जाल्या ज्या द्वारासीं। साह्य त्यासीं तेणें जावें ॥४४॥ मारावया वानरपंक्ती। हुडोहुडीं[5] गुप्तगतीं। यंत्रे जोडिलीं नेणो किती। क्रोधानुवृत्ती रावणें ॥४५॥ दुर्गासीं झोंबतां वानरें। मारावया गुप्तमारें। चर्याचर्या सज्जिले यंत्रें। दशशिरें रणमारा ॥४६॥ दुर्ग सज्जिले दारुण। दुर्गीं झोंबतां वानरगण। यंत्रमारें मरती पूर्ण। ऐसें आपण न करावें ॥४७॥ यंत्रोयंत्रीं दीर्घ ध्वजा। श्वेत पीत आरक्त विरजा[6]। दुर्गवेष्टणीं समसमजा। उभविल्या बोजा शोभती ॥४८॥ हुलमुखे दीर्घ हुडे। विचित्र निर्वाळिले कडे। पताका सज्जिल्या चहूंकडे। राक्षस गाढे राखिती ॥४९॥

ती योजना ऐकून वानरांवर काहीच परिणाम होत नाही. वानरांनी आकाशातून हल्ला केल्यामुळे राक्षसांचा एकच गोंधळ उडतो :

ऐकोनि बिभीषणाची युक्ती। वानर गदागदां हांसती। आमच्या उड्डाणव्युपत्ती। दुर्ग किती यंत्रेंसीं ॥५०॥ लंकेचिया शिखरावरी। उड्डाण कीजे वानरीं। तेथें दुर्गाच्या यंत्रमारीं। कवणावरी पडावें ॥५१॥ ऐकोनि वानरांची मात। बिभीषण अति विस्मित। श्रीराम स्वानंदें हासत। अति पुरुषार्थ वानरां ॥५२॥ दुर्गातळीं जे राहती। यंत्रमारें ते मरती। वानरां दुर्गावरी गती। यंत्रें जाती सुनाट ॥५३॥ ऐशी बिभीषणाची पाळती। ऐकोनि दुर्गाची संस्थिती। श्रीराम सांगे सुग्रीवाप्रती। द्वारानुवृत्ती निरोधा ॥५४॥ दुर्गामाजि तडा पडे। तैसीं धरावीं पाणियाडें। दुर्ग वेढावें चहुंकडे। मागेंपुढें ढळों नेदीं ॥५५॥ भितरिल्या बाहेर नव्हे गती। बाहेरील भीतरी जावो न शकती। दुर्ग निरोधावें ऐशा रीतीं। स्वयें रघुपति सांगत ॥५६॥

कपीनामुग्रवीर्याणां सहस्रैर्बहुभिर्वृतः। नीलः प्रहस्तं प्लवगो राक्षसं प्रति धावताम् ॥१६॥
अंगदो वालिनः पुत्रो बलेन महता वृतः। दक्षिणे धावतां द्वारे महापार्श्वमहोदरौ ॥१७॥
हनूमान्पश्चिमं द्वारं निष्पीड्य पवनात्मजः । प्रविशत्वप्रमेयात्मा कपिभिर्बहुभिर्वृतः ॥१८॥

शब्दार्थ : १. शत्रूचे, २. तोफा, ३. हुशार, ४. इच्छितरूप धारण करणारे, ५. बुरुजांवर, ६. साहाय्यभूत,

परिक्रामति यत्सर्वाल्लोकान्संतापयन्प्रजा: । तस्याहं राक्षसेंद्रस्य रावणस्य वधे धृतः ॥१९॥
उत्तरं नगरद्वारमहं सौमित्रिणा सह । निपीड्याभिप्रवेक्ष्यामि सबलो यत्र रावणः ॥२०॥
वानरेंद्रश्च बलवान्ऋक्षराजश्च वीर्यवान् । राक्षसेंद्रानुजश्चैव गुल्मे भवतु मध्यमे ॥२१॥

प्रहस्त पूर्वद्वारानुवृत्ती। त्यासीं भिडावया नीळ दळपती। सर्वे वानर भद्रजाती। दुर्गगती निरोधा ॥५७॥ दक्षिणद्वारीं महावीर। महापार्श्वद महोदर। त्यांवरी अंगद वाळिकुमर। द्वारनिर्धार रणकंदना ॥५८॥ पश्चिमद्वारीं इंद्रजित। त्याचा करावया घात। बळिया ठेविला हनुमंत। रणकंदनार्थ राक्षसां ॥५९॥ मुख्यत्वें कपटी पूर्ण। उत्तरद्वारीं असे रावण। त्याचें करावया कुळनिर्दळण। रामलक्ष्मण आम्ही दोघे ॥६०॥ राजा सुग्रीव जांबवंत। बिभीषण शरणागत। यांहीं राहावें मध्यगुल्मांत[१]। सैन्य समस्त लक्षूनी ॥६१॥ कोणे द्वारीं कैसें रण। वीरां वानरां युद्धकंदन। भंगलिया बळासी जाण। साह्य संपूर्ण इहीं व्हावें ॥६२॥ ऐसा मध्यगुल्मवृत्तांत। दुर्ग रोधूं सांगे रघुनाथ। ते वानरीं ऐकोनि मात। लंकाग्रहणार्थ मांडिला ॥६३॥ ज्यांच्या वांट्या जें द्वार। ते ते द्वारीं वानरवीर। करिते झाले चरित्र। अति विचित्र अवधारा ॥६४॥ दुर्गतळीं राहतां वीर। होईल यंत्रांचा महामार। हें जाणोनियां वानर। करिती दुर्धर तें ऐका ॥६५॥ लंकेहूनि उंच पर्वत। आणोनियां योजनांत। वानर निजद्वारीं स्थापित। राक्षसांत करावया ॥६६॥ पर्वतीं वेंधले[२] वानर बळी। लंकादुर्ग राहिलें तळीं। राक्षसदुर्गाचिये पौळी। घायातळीं आतुडले ॥६७॥ त्यासीं हाणितां शिळाशिखर। घायीं अष्टांगें होती चूर। वानरीं करितां महामार। दुर्गधर पळाले ॥६८॥ वीर धीर सपुरते। हुडोहुडां[३] नित्य जागते। वानर देखोनि आपणावरते। तेही निश्चितीं गजबजिले ॥६९॥ आम्ही तळीं ते दुर्गावरी। येथें झाली विपरीत परी[४]। वानरीं आणोनि महागिरी। आम्हांहीवरी वळंघले ॥७०॥ हुडोहुडां वीर अमित। वानर करिती पर्वतघात। शतसहस्र चूर्ण करित। हुडे खचत आघातें ॥७१॥ पारख्या करितां महामारी। दुर्गीं जोडल्या यंत्रहारी। त्याही उचलोनि वानरीं। नेवोनि सागरीं घातल्या ॥७२॥ दुर्गासभोंवते याचिपरी। हुडोहुडां पै वानरीं। राखणाइतां महामारी। अपांपरी[५] राक्षसां ॥७३॥ एकें निमालीं प्राणांत। एकें घायवट[६] हुंबत[७]। उरलीं जीव घेवोनि पळत। दुर्गनिर्मुक्त कपिभयें ॥७४॥ दुर्गाचिया पौळोपौळीं[८]। राक्षसां करोनि रवंदळी[९]। वानरवीरीं आतुर्बळीं। नगरधांडोळी मांडिली ॥७५॥ एकाचे मुकुट आसुंडती। एकाचीं शस्त्रें हिसकिती। वीर हाणितां आघातीं। उडोनि जाती आकाशीं ॥७६॥ न घेतां रत्नें मुक्ताफळें। हाटवाटींचीं[१०] विकतीं[११] फळें। आणोनिया निजबळें। सुखसमेळें भक्षिती ॥७७॥ आणोनि गुळाचिया भेंडा[१२]। वानर खाती मटमटां। दुकानींचा काढोनियां सांटा। मधु घटघटां सेविती ॥७८॥ आणोनियां फुटाण्यांची पाटी। वानर खाती लाळघोटी। चारें बोरें लुटिती हाटीं। नाचती चौहाटीं लंकेच्या ॥७९॥ देखोनि वानरांची धाडी। निशाचरीं दिधली उडी। घरोघरीं कडाफोडी। केलीं बापुडीं राक्षसें ॥८०॥ श्रीराम म्हणे सुवेळागिरी। वळंघोनियां[१३] तयावरी। युद्ध होत लंकागिरीं। वीरीं वानरीं तें पाहों ॥८१॥

स तु कृत्वा सुवेलस्य मतिमारोहणं प्रति । लक्ष्मणानुमतो रामः सुग्रीवमिदमब्रवीत् ॥२२॥
बिभीषणं च धर्मज्ञमनुरक्तं निशाचरम् । लंकामालोकयिष्यामो निलयं तस्य रक्षसः ॥२३॥
रामः सुवेलमारोहद्धासार्थं चित्रकाननम् । अध्यारोहंत शतशः सुवेलं यत्र राघवः ॥२४॥
शासनादथ रामस्य सुग्रीवस्य बिभीषणः। द्वारे द्वारे प्लवंगानां कोटिं कोटिं न्यवेशयत् ॥२५॥

---

**शब्दार्थ :** १. सेनेच्या मध्यव्यूहांत, २. चढले. ३. प्रत्येक बुरुजावर. ४. तऱ्हा, ५. दुर्दशा, ६. घायाळ, ७. कुंथत, ८. भिंतीभिंतीवर, ९. नाश, १०. बाजारीची, ११. विक्रीस ठेवलेलीं, १२. ढेंपी, १३. चढून.

**नंतर सुवेळागिरीवर आक्रमण :** राम जावया सुवेळेप्रती। लक्ष्मणाच्या विचारवृत्तीं। आणी सांगोनियां सुग्रीव कपीप्रती। बिभीषणानुमतीं निघे राम॥८२॥ आतां येथून अहर्निशीं। नित्यवस्ती सुवेळेसीं। ऐसें सांगोनि सर्वांसी। निघे वेगेंसीं श्रीराम॥८३॥ ऐसी ऐकतांचि गोष्टी। वानरवीर कोट्यानुकोटी। धावोनियां सुवेळापृष्ठीं। शिळा समपृष्ठीं आंथुरिती॥८४॥ लंकेआंतील वृत्तांत। सुवेळेहुनि असे दिसत। याचि अनुलक्षीं रघुनाथ। सुवेळाआंत राहिला॥८५॥ लावोनियां निशाण भेरी। श्रीराम चढे सुवेळागिरी। परिवारिला वानर भारीं। निजगजरीं पैं आला॥८६॥

**राक्षस तळात असताना वानरांचे लंकेवर व दुर्गावर आकाशातून आक्रमण :** लंका देखोनि रघुपती। स्वयें सांगे वानरांप्रती। दुर्ग घ्यावे हातोहातीं। लंकापती गांजोनी॥८७॥ राक्षसीं भय घेतलें भारी। कोणी न ये लंकेबाहेरी। आपण रिघोनिया भीतरीं। सहपरिवारीं दुर्ग घ्यावें॥८८॥ ऐकोनि श्रीरामची मात। सुग्रीव वानरां सांगत। करोनि राक्षसांचा घात। दुर्गाआंत रिघावें॥८९॥ बिभीषण सांगे रामाजवळी। जे जे आले लंकेच्या मूळीं। त्या त्या सैन्या हाती रांगोळी। यंत्रानुमेळीं महामारें॥९०॥ लंकेसीं वारा वाजतां भीत। पक्षी भोंवों न शकती तेथ। रावणें राखिली अति गुप्त। जालें विपरीत ते ठायीं॥९१॥ लंकेहूनि उंच योजनांत। वानरीं आणिले पर्वत। वीर वळंघोनि तेथ। रणकंदनार्थ राक्षसां॥९२॥ श्रीरामप्रतापनव्हाळी[१]। लंकादुर्ग राहिलें तळीं। पर्वतावरूनि वानर बळी। करिती रांगोळी राक्षसां॥९३॥ लाहोनि श्रीराम सामर्थ्य। वानरीं केला विपरीतार्थ। जोडोनियां पर्वता पर्वत। लंका समस्त रोधिली॥९४॥ पाडोनि दुर्गाच्या पौळी। यंत्रें उचटून समूळीं। सागर भरिला यंत्रगोळीं। आतुर्बळी वानर॥९५॥ वानरांच्या भयेंकारीं। हाट[२] चौहाटा[३] लंकापुरीं। कोणी वागेना बाहेरी। अपांपरी[४] राक्षसां॥९६॥ ऐसे बोलोन बिभीषण। वानरां सांगे आपण। आतां घ्यावें लंकाभुवन। रणकंदन करीतही॥९७॥ श्रीराम असतां पाठिराखा। कायसा पाड दशमुखा। कांहीं न धरोनि शंका। अवश्य लंका तुम्ही घ्यावी॥९८॥

ऐसें एकतां उत्तर। वानरीं केला जयजयकार। देवोनि रामनामें भुभुःकार। लंकापुर ठाकिलें॥९९॥

**लंकेला वेढा व आत प्रवेश :** श्रीरामाज्ञेची थोरी। लंका वेढिली वानरीं। गुळीं जैशा मुंग्यांच्या हारी। तैशापरी झोंबती॥१००॥ न लगे अर्गळा[५] काढणें। न लगे श्रृंखला तोडणें। न लगे कपाटें उघडणें। वानर किराणें[६] गड घेती॥१॥ राक्षसी हाणावें हातियेरीं। वानर उंच पर्वताग्रीं। मारावें जों यंत्रमारी। वानरी यंत्रें बुडविलीं॥२॥ लंकेभोंवतीं दुसरी। पर्वतलंका केली वानरीं। त्यावरी वळंघोनि महावीरीं। दुर्गाभीतरीं प्रवेश॥३॥ वानरवीर जगजेठी। असंख्य निघाले लंकात्रिकुटीं। मारितां राक्षसांच्या कोटी। सुग्रीवें पाठी राखिली॥४॥ वानर ढेंसले[७] लंकेभीतरीं। बोंब सुटली घरोघरी। अपांपरी करितां राक्षसां महामारी। वानर ढेंसले लंकेभीतरीं।

राक्षसां॥५॥

ततः सहस्रयूथाश्च कोटियूथाश्च यूथपाः। कोटियूथशताश्चान्ये लंकामारुरुहुस्तदा॥२६॥
जयत्युरुबलो रामो लक्ष्मणश्च महाबलः। राजा जयति सुग्रीवः श्रीरात्रेणानुपालितः॥२७॥
परिखां पूरयंतश्च गंभीरविमलोदकाम्। पांसुभिस्तृणकाष्ठैश्च पर्वताग्रैश्च वानराः॥२८॥
इति ते घोषयंतश्च गर्जंतश्च प्लवंगमाः। अभ्यधावंत लंकायाः प्राकारं कामरूपिणः॥२९॥

---

**शब्दार्थ :** १. श्रीरामप्रतापाचा चमत्कार, २. बाजार, ३. चवाठे, ४. दुर्दशा, ५. अडसर, ६. उड्डाणाने, ७. शिरले.

श्रीरामज्ञासन्निष्ठी[1]। वानर लक्षानुलक्षकोटी। वृंदानुवृंद जगजेठी। लंकापीठीं प्रवेशले।।५।। यूथपावरी[2] यूथप। वानर आले सप्रताप। विध्वंसावया मठ मंडप। अति साटोप[3] चालिलें।।७।। फाडिती पताका तोडिती तोरणें। पाडिती मंदिरें सप्तखणें। राजमंदिरें शोभायमानें। करिती कंदनें वानरें।।८।। खंदक बुजिती आतुर्बळी। खंदकामाजी घालिती धुळी। पर्वतशिखरें काष्ठें शिळीं। परिघ समूळीं बूजिला।।९।। करिती राक्षसांची होळी। पाडिती दुर्गाचिया पौळी। वानर येवोनि आतुर्बळी। पिटिती टाळी जयाची।।११०।। आम्ही श्रीरामाचे दूत। प्रवेशलों लंकेआंत। श्रीराम जाला यशवंत। हर्षे गर्जत वानर।।११।। श्रीराम नित्य विजयान्वित। लक्ष्मण सदा यशवंत। श्रीरामें सुग्रीवा राज्य प्राप्त। तोही निश्चित निजविजयी।।१२।। जयजयकाराचा गजर। रामनामें गर्जती वानर। लंका घेतली सत्वर। श्रीरामचंद्र निजविजयी।।१३।। लंकाराज्य समस्त। बिभीषणासी जालें प्राप्त। ऐसें वानर गर्जत। हर्षयुक्त स्वानंदें।।१४।। यापरी स्वयें लंकेआंत। वानर गर्जत नर्तत[4]। राक्षस त्रासले समस्त। सांगती आकांत लंकेशा।।१५।।

ततस्ते राक्षसास्तत्र गत्वा रावणमंदिरम् । न्यवेदयत्पुरी रुद्धा रामेण सह वानरैः।।३०।।
रुद्धां तु नगरीं श्रुत्वा जातकोपो दशाननः। विधानं द्विगुणं कृत्वा प्रासादं चाप्यरूरुहत्।।३१।।
स ददर्शावृतां लंकां सशैलवनकाननाम् । असंख्यातैर्हरिगणैः सर्वतो योद्धुमाहवे।।३२।।
स दृष्ट्वा वानरैः सर्वैः काननं कपिलं कृतम्। कथं क्षपयितव्याः स्युरिति चिंतापरोऽभवत्।।३३।।

वानरीं त्राशिले निशाचर। रावणा सांगती सत्वर। पर्वतशिळाशिखरांचा मार। करीत वानर पैं आलें।।१६।। दुर्गाहूनि योजनांत। लंकेसभोवतें पर्वत। वानर वळंघोनि[5] तेथ। केला निर्घात राक्षसां।।१७।। वानर पर्वताग्रीं महाबळी। लंकादुर्ग राहिलें तळीं। वर्षोनि पर्वतशिखरशिळीं। केली रांगोळीं राक्षसां।।१८।। कपींसी न चाले हतियेर। उंच पर्वताग्रीं वानर। त्यांसी न चले यंत्रमार। निशाचर चडफडती।।१९।। वानरां न लगे दुर्ग पाडणें। न लगतीं कपाटें उघडणें। त्रिकूट घेतलें जी निजकिराणें[6]। अति सत्राणें उडोनी।।१२०।। उड्डाणबळें जगजेठी। वानरांच्या कोट्यनुकोटी। पैल पाहे लंकापीठीं। वीर त्रिकुटी दाटले।।२१।। वानरांचे माराभेण। राक्षस जाले पलायमान। राक्षस पळती जीव घेऊन। दुर्गरक्षण असेना।।२२।। यापरी गा लंका एथ। वानरीं करोनि निर्मुक्त। प्रवेशले रामदूत। कपि गर्जत रामनामें।।२३।। वृथा वानिती प्रधान प्रौढी। आम्ही मारूं वानरकोडी। आल्या वानरांच्या धाडी। देवोनि दडी लपताती।।२४।। सवेग येतां वानरधाडी। दुर्गींच्या फांजी[7] पौळी[8] पाडी। खंदक बुजिले निर्वडीं[9]। कडाफोडी लंकेसीं।।२५।। ऐकोनि राक्षसांची मात। गजबजिला लंकानाथ। वानर भरले लंकेआंत। पाहूं चढत अटाळीं[10]।।२६।। रावण चढोनि गोपुरीं। पाहे तंव वानरहारी। दाटले लंके आंतबाहेरी। वनोवनांतरीं कपिभार।।२७।। वानरसैन्य असंख्यात। न समाये लंकेआंत। पौळीं वानर समस्त। वनीं वृक्षस्थ ठेसले[11]।।२८।। वानरसभेच्या समेळीं। पिंवळ्या दिसती दुर्गपौळी। कपिप्रभा आणि प्रभावळी। दिसती पिंवळीं वृक्षवनें।।२९।। लंकां सबाह्य[12] संपुटीं। देखोनियां वानरथाटी। रावणा चळकांप उठी। कैशी निकटीं कपिधाडी।।१३०।। रावण देखोनि गोपुरीं। जो तो वानर उपराउपरी। युद्धालागीं स्वयें पाचारी। निघें बाहेरी नपुंसका।।३१।। एकीं देवोनी किराण। ढिलावूं पाहती रावण। तें देखोनि दशानन। अति उद्विग्न स्वयें जाला।।३२।। मज दशमुखासमोर। वनचरें

शब्दार्थ : १ .श्रीरामाचे आज्ञाधारक, २. यूथप- सैन्यनायक, ३. आवेशयुक्त, ४. नाचू लागले, ५. चढून, ६. आपल्या उड्यांनी, ७. भिंती, ८. तट, ९. नेटाने, १०. गच्चीवर, ११. दाटले. १२. लंकेच्या आतबाहेर

पालेखाइर। युद्धां धांवती सत्वर। वानरवीर महाबळी ॥३३॥ वानर देखोनि दुर्धर। तळीं उतरला दशशिर। कपींसीं करावया रणमार। सैन्य सत्वर मोकली[१]॥३४॥

ततः कोपपरीतात्मा रावणो राक्षसाधिपः। निर्याणं सर्वसैन्यानां द्रुतमाज्ञापयत्तदा ॥३४॥

निष्पतंति तदा सेना हृष्टा रावणचोदिताः। एतस्मिन्नंतरे रौद्रः संग्रामः समपद्यत ॥३५॥

राक्षसानां वानराणां घोराणां कामरूपिणाम्ः। ते गदाभिः प्रवृत्ताभिः शूलशक्तिपरश्वधैः ॥३६॥

निर्जघ्नुर्वानरोन्घोरान्कंपयंतः स्वविक्रमान् । तदा वृक्षैमहाकायाः पर्वताग्रैश्च वानराः ॥३७॥

निर्जघ्नुरथ रक्षांसि नखैर्दंतैश्च वेगिताः ॥३८॥

त्यामुळे रावणाचा क्रोध, राक्षस वानरांचे युद्ध : कपि प्रवेशले लंकेआंत। तेणें कोपला लंकानाथ। निजसैन्या स्वयें मोकलित। रणकंदनार्थ वानरा ॥३५॥ सैन्य पाठवीलें सत्वर। तेथें वानर निशाचर। युद्ध करिती घोरांदर। येरयेरां नोकूनी[२]॥३६॥ राक्षस आले करीत गजर। नामें वानरांचा भुभुःकार। घाय हाणिती निष्ठुर। येरयेरां उपमर्द॥३७॥ राक्षसांचा शस्त्रसंपात। वानर तळपोनि चुकवित। कपींनीं करितां पर्वतघात। रणीं हुंबत राक्षस॥३८॥ वानर धरोनिया पुच्छीं। उपटितां अति आवेशीं। वानरें ओरबडोनि नेत्रांसी। आणिलें राक्षसांसी अंधत्व॥३९॥ वामहस्तें नेत्र फोडी। दक्षिणहस्तें देवोनि थापडी। राक्षसांतें तळीं पाडी। नाक कान करांडी अतिरागें॥४०॥ वानर धरोनि चरणकमळीं। उपटूं जातां आतुर्बळीं। पुच्छें त्यांची निमटून नळीं[३]। पाडिती भूतळीं राक्षसां॥४१॥ राक्षसीं वानरां उठाउठीं। रणीं झाली लटापटी। झोंटी धरोनि पाडितीं सृष्टीं। हाणिती मुष्टी निष्ठुरा ॥४२॥ गदा मुद्गल शूळ शक्ती। राक्षस निजबळें हाणिती। शालताल शिळापर्वतीं। वानर मारिती राक्षसां॥४३॥ दंडीं मुंडपीं[४] उरीं शिरीं। थडका हाणिती शिरोदरीं। पुच्छ आणोनी उरावरी। पाडिती हारी राक्षसांच्या ॥४४॥ शस्त्रास्त्रासीं घडघडाट। आले राक्षस रथथाट। तें देखोनियां मर्कट। रथानिकट स्वयें आलें ॥४५॥ शस्त्रें हाणितां राक्षसीं। वानर उसळले आकाशीं। वर्षोनियां पर्वतांसी। सहित रथेंसीं चकचूर॥४६॥ वानर वेगीं निमेषार्धांत। मकरतोंडीं धरोनि रथ। बळें भूतळीं उपडित। केलें भस्मांत असंख्य ॥४७॥ राक्षसरथ कोट्यनुकोटी। वानरीं उपडितां सृष्टीं। रणीं एक बोंब उठी। लंकात्रिकूटीं आकांत ॥४८॥ वानरश्रेणी[५] पडतां रणीं। श्रीरामाच्या नामस्मरणीं। व्यथा जावोनि तत्क्षणीं। उठतीं रणीं संग्रामा ॥४९॥ नाम स्मरतां प्रल्हादासीं। शस्त्रें न रुपती अंगासीं। श्रीराम असतां पाठीसीं। वानरांसी भय काय॥५०॥ आम्ही श्रीरामाचे दूत। वानर निजनामें गर्जत। गजवाजिरथांचा निःपात। असंख्यात राक्षसां ॥५१॥

स संप्रहारस्तुमुलो मांसशोणितकर्दमः। राक्षसानां वानराणां बभूवाद्भुतदर्शनः ॥३९॥

वनौकसां तत्र तु सन्निनादो। लंकागतानां च निशाचराणाम्।

प्रक्ष्वेडितास्फोटितनर्दितानां द्वाभ्यां महद्भ्यामिव सागराभ्याम् ॥४०॥

वानर राक्षस रणांगणीं। भिडिन्नले आयणींपायणीं[६] मांसशोणितकर्दम[७] धरणीं। पर्वतपाषाणीं विमर्द ॥५२॥ वानर वर्षती पर्वत। निवारण न चलेचि तेथ। अनिवार पर्वतघात। तेणें प्राणांत राक्षसां ॥५३॥ आड धरितां वोढण[८]। वोढणेंसीं वीरां मरण। पर्वतघातें शतचूर्ण। अचुक मरण राक्षसां ॥५४॥ राक्षस दुर्गाचिया पौळीं। वानर पर्वताग्रीं आतुर्बळी। वर्षोनि

शब्दार्थ : १.पाठवी, २. पराभव करून, ३. मान, ४. पागोट्यांवर, ५. वानरसमूह, ६. क्रमाने, ७. रक्तमांसाचा चिखल ८. ढाल.

वृक्षपर्वतशिळीं। केली रांगोळीं राक्षसां ॥५५॥ पर्वतीं न चले शस्त्रसंपात। पर्वतीं न चले बाणावर्त। राक्षस पावोनि आकांत। लंकेआंत पळाले ॥५६॥ दोनी समान सैन्यसागर। समान बळ समान शूर। युद्ध केलें घोरांदर। अति दुर्धर रणमर्द ॥५७॥ परस्परें गर्जत। परस्परें नर्तत। परस्परें नोकित[१]। रणोन्मत्त भिडिंनले ॥५८॥ वानरांचा पर्वतघात। राक्षस त्रासले अद्भुत। तें पळाले लंकेआंत। अति कुंथत घायाळ ॥५९॥ राक्षससैन्या बोहट तेथ। श्रीरामसैन्य विजयभरित। हें देखोनि श्रीरघुनाथ । सुग्रीवादि तोषले ॥१६०॥ एका जनार्दना शरण । लंकावेष्टन राक्षसकंदन। पुढें अंगदशिष्टाईकथन। सावधान अवधारा ॥६१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटिकायां प्रथमयुद्धकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ ओंव्या ॥१६१॥ श्लोक ॥४०॥ एवं ॥२०१॥

## अध्याय पाचवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### रावण - सुग्रीव यांचे युद्ध

सुवेळेवरून सुग्रीव लंकेत उडून गेला : सुवेळे बैसल्या रघुकुळटिळका। मनोहर दिसताहे लंका। संमुख देखोनि दशमुखा। केला आवांका सुग्रीवें ॥१॥

ततो रामः सुवेलाग्रं योजनद्वयमंडलम् । आरुरोह ससुग्रीवो हरियूथैः समन्वितः ॥१॥
ददर्श लंका सुव्यक्तां रम्यकाननशोभिताम् । तस्यां गोपुरशृंगस्थं राक्षसेंद्रं दुरासदम् ॥२॥
श्वेतचामरपर्यस्तं विजयच्छत्रशोभितम् । पश्यतां वानरेंद्राणां राघवस्थापि पश्यतः ॥३॥
दर्शनाद्राक्षसेंद्रस्य सुग्रीवः सहसोत्थितः । अचलाग्रादथोत्थाय पुप्लुवे गोपुरस्थले ॥४॥

श्रीराम चढला सुवेळेवरी। सहित सुग्रीव कपिसंभारीं। दोनी योजनें सुवेळाग्री। सभा वानरीं शोभत ॥२॥ तंव देखिलें लंकानगर। वनीं काननीं अति सुंदर। त्यामाजी रावणाचें गोपुर[२]। दीर्घ मनोहर रमणीय ॥३॥ श्रीरामसेना वानरसंभार। आले देखोनि अपार। ते पहावया दशशिर। सवेग गोपुर वळंघला ॥४॥ रावण अंजनाभ[३] काळा। सुवर्णभूषणीं सोज्ज्वळा। कांसे आरक्त पाटोळा। आरक्त माळा रत्नाढ्य ॥५॥ सवें निशाचरांचा भार। युग्मचामर[४] श्वेतातपत्र। ऐसा देखोनि दशशिर। सुग्रीव वीर क्षोभला ॥६॥ माझ्या स्वामीची चोरिली कांता। कायसें छत्र याचिया माथां। याच्या करीन मी घाता। साटोपता खवळला ॥७॥ वळिला पुच्छाचा आंकोडा। रोमें थरकती चहूंकडां। वेग न धरवे गाढा। अति वेगाढा उडाला ॥८॥ श्रीरामासी न पुसतां। कोणासी न विचार सांगतां। गेला गोपुराआंतौता। लंकानाथा संमुख ॥९॥

स्थित्वा मुहूर्तं संप्रेक्ष्य निर्भयेनांतरात्मना । तृणीकृत्य च तद्रक्षः सोब्रवीत्परुषं वचः ॥५॥
लोकनाथस्य रामस्य सखा दासोस्मि राक्षस। न मया मोक्ष्यसेऽद्य त्वं पार्थिवेंद्रस्य तेजसा ॥६॥
इत्युक्त्वा सहसोत्पत्य पुप्लुवे तस्य चोपरि। आकृष्य मुकुटं चित्रं पातयामास तद् भवि ॥७॥

रावण व सुग्रीवाची झटापट : पडतां सुग्रीवाची उडी। निशाचरें झालीं वेडीं। रावणासी शंका गाढी। वळली बोबडी सर्वांची ॥१०॥ खुंटली राक्षसांची युक्ती। सुग्रीव गर्जे रावणाप्रती। श्रीरामाचा सखा सांगाती। जाण निश्चितीं सेवक ॥११॥ सुग्रीव तो मी विख्यात।

---

शब्दार्थ : १. दुःख देत, २. मनोरा, ३. काजळाप्रमाणे, ४. दोन चवऱ्या.

तुझा करूं आलो घात। माझेनि हातें लंकानाथ । आजि जिवंत वांचेना ।।१२।। ऐसें बोलोनि निष्ठुर। निःशंक उभा सुग्रीव वीर। कोणा न बोलवे उत्तर। अधोमुख[1] राक्षस ।।१३।। सुग्रीव उभा मुहूर्त। कांहीं न बोले लंकानाथ। उडोनि उरावरी देत लात। मुकुटा हात घातला ।।१४।। मुकुट आंसुडितां तत्काळीं। दोघे जण आतुर्बळी। आदळते क्षितितळीं। रावण ते काळीं मूर्च्छित ।।१५।। मुकुट घेवोनियां जाण। सुग्रीव निघतां त्वरा करून। साधव होवोनि रावण। काय आपण बोलत ।।१६।।

समीक्ष्य तूर्णमायांतं तं बभाषे निशाचरः। सुग्रीव त्वं परोक्षे मे हीनग्रीवो भविष्यसि ।।८।।
इत्युक्त्वोत्थाय तं क्षिप्रं बाहुभ्यामाक्षिपत्तले। कंदुवत्स समुत्थाय बाहुभ्यामाक्षिपद्धरिः ।।९।।
परस्परं स्वेदविदिग्धगात्रौ परस्परं श्लिष्टनिरुद्धचेष्टौ।
परस्परं शोणितरक्तदेहौ परस्परं शाल्मलिकिंशुकौ यथा ।।१०।।
मुष्टिप्रहारैश्च तलप्रहारैरंघ्रिप्रपातैश्च कराग्रपातैः।
तौ चक्रतुर्युद्धमसह्यरूपौ महाबलौ वानरराक्षसेंद्रौ ।।११।।

मुकुटेंसीं सुग्रीव जात। त्यासी पाचारी लंकानाथ। मी दुश्चित होतों मूर्च्छित। युद्ध न करितां तूं कैंवी जासी ।।१७।। मजवरी घालोनियां उडी। आतां पळतोसी तांतडी[2]। कराग्रें हाणोनियां थापडी। ग्रीवा[3] रोकडी पाडीन ।।१८।। जरी आहे आंगवण। परत करावयासी रण। पुढें जासी तैं काळें वदन। कोपें रावण अनुवादे ।।१९।। वेगें उडोनियां लंकानाथ। सुग्रीवातें आंसुडित। तेणें तो गदगदां हांसत। तुझा पुरुषार्थ इतकाचि ।।२०।। सुग्रीवें आंसुडितां रावण। तोंडघसीं पडला जाण। वीसही बाहु स्वयें टेंकून। दशानन ऊठिला ।।२१।। तेणें रागें पैं रावण। सांडोनियां शस्त्रास्त्रीं रण। आंगीं आदळला आपण। विचार आन कल्पूनी ।।२२।। कपि निश्चित वानराअंगीं दोनचि हात। विसां हातीं मी समर्थ । कळा लावोनि सर्वांगांत। मारीन ।।२३।। पालेखाईर वानर किती। याचे अंगीं कायसी शक्ती। मी सबळ बळें लंकापती। हातोहातीं मारीन ।।२४।। तंव तो वानर आतुर्बळी। विसां हातांचि पैं मौळी। पुच्छीं बांधिली तत्काळीं। रावण ते वेळीं गजबजिला ।।२५।। ते काळीं दशानन। पुच्छासीं डसला आपण। तेव्हा सुग्रीवें हांसोन। दिधला सोडून उपेक्षूनी ।।२६।। मल्लविद्येच्या निर्वडीं। दोघे भिडतां पडिपाडीं[4]। उलट लोट घाय घडमोडी। गुप्त थापडी करघात ।।२७।। झोंबी घेता अत्युद्भत। स्वेदें न्हाले डवडवित। कळा लाविंतां वर्मस्थ। निचेष्टित होती दोघे ।।२८।। नखक्षतांचे महामार। दोघांही अंगी वाहे रुधिर। वसंतीं फुलले किंशुक तरुवर। तैसे महावीर भासती ।।२९।। पांपर हाणित तळपोनियां मुष्टिघात। परस्परां वंचोनियां देत। चुकवितां मुष्टिघात। पांपर हाणित साटोपें ।।३०।। पांपर[5] चुकवितां तेथ। उठतां हाणिती तळाघात। तळाघातें तळीं पाडित। उलट लोट मग हाणित हुमण्या[6] ।।३१।। पदाभिघाताची पैं थोरी। तडवे हाणिती परस्परीं। वानर देती उरीं। हाणिती शिरीं कराघात ।।३२।। दोघांचें युद्ध घोरांदर। सुरांसुरां अति दुर्धर। वानर आणि निशाचर। करिती विचित्र मंडळें ।।३३।। गोपुरभूमिका समस्थळ। दोघीं युद्ध केलें चिरकाळ । युद्ध देखोनि कळिकाळ। धाकें चळचळ कांपती ।।३४।।

कृत्वा नियुद्धं भृशमुग्रवेगौ। कालं चिरं गोपुरवेदिमध्ये।
उत्क्षिप्य चोत्क्षिप्य विनम्रदेहौ। पादक्रमाद्गोपुरवेदिलग्नौ ।।१२।।
अन्योन्यमापीड्य विलग्नदेहौ तौ पेततुः सालनिखातमध्ये।
उत्पेततुर्भूतलमस्पृशंतौ स्थित्वा मुहूर्तं त्वभिनिःश्वसंतौ ।।१३।।

---

**शब्दार्थ :** १. खालीं तोंड घालून, २. घाईने, ३. मान, ४. नाना प्रकारांनी, ५. लाथ, ६. कोपरखळ्या.

गोपुरभूमिकेमाझारां। युद्ध तगटल्या[1] दोनी[2] धुरा[2]। उपटूं धांवती येरयेरां। मल्लविद्याद्वारा तळपोनी ॥३५॥ येरयेरां निघोनि तळीं। उपटितां आतुर्बळी। तोही तळपोनि तत्काळीं। दुजा आकळी उपटावया ॥३६॥ येरयेरां झोंबी घेती। झोंबल्या युक्ती आकळिती। कंटी[3] कंठीं कळा लाविती। दोघे राहती निचेष्टित ॥३७॥ खवळोनि दोघे दुर्धर। वाम सव्य चमत्कार। उलट टोले देतां पांपर[4]। येरयेरां मिसळले ॥३८॥ उरीं शिरीं खांदां कोपरीं। घाय देती उदरेंदरीं। हुमणी हाणोनि मुखावरी। चक्रकारीं भोंवंडिती ॥३९॥ खचोनियां गोपुरींहूनि अवनीं[5]। दोघे पडले सभास्थानीं। अंग न लागतां धरणीं। उडोनि गगनीं भीडती ॥४०॥ आकाशगती स्वयें वानर। दुजा सहजचि खेचर[6]। दोघे भिडती निराधार। सुरासुर विस्मित ॥४१॥

आलंग्य चालिंग्य च बाहुयोक्तेः संयोजयामासतुराहवे तौ।
संरंभशिक्षाबलसंप्रयुक्तौ सुचेरतुः संप्रति युद्धमार्गे ॥१४॥
शार्दूलसिंहाविव जातदंष्ट्रौ गजेंद्रपोताविव संप्रयुक्तौ।
संहत्य संवेद्य च तौ कराभ्यां तौ पेततुर्वै युगपद्धरायाम् ॥१५॥
उद्यम्य चान्योन्यमधिक्षिपंतौ संचक्रमाते बहुयुद्धमार्गे
व्यायामशिक्षाबलसंप्रयुक्तौ क्लमं न तौ जग्मतुराशु वीरौ ॥१६॥
बाहूत्तमैर्वारणवारणाभैर्निवारयन्तौ परवारणाभौ।
चिरेण कालेन भृशं प्रयुद्धौ संचेरतुर्मंडलमार्गमाशु ॥१७॥

मुहूर्तमात्र राहोनि स्थिर। धांपा जिरवोनि महावीर। युद्धा मिसळले दुर्धर। येरयेरां हांकोनी ॥४२॥ बाहुबळें लावूनि वेसणी[7]। आंसडोनि आणितां धरणीं। येरयेरां नाकळे कोणी। समान दोन्ही संग्रामीं ॥४३॥ वीस भुजीं लावितां झडका। सुग्रीवें हाणिल्या थडका। दाहीं शिरीं उठिल्या तिडका। तेणें दशमुखा आकांत ॥४४॥ वानर नाटोपे पैं देखा। ऐसें कळलें लंकानायका। तरी युद्धाचा आवाका[8]। स्वयें दशमुखा न सांडवे ॥४५॥ साटोपोनियां रावण। पुढती करूं आला रण। थरक सरक वेगविंदान। रणप्रवीण ते दोघे ॥४६॥ घात पात चपेट आघात। उलट पांपरा[9] प्राणांत। ऐसे मल्लविद्यासंकेत। दोघे दावित रणमारें ॥४७॥ दोघे वीर अति दुर्धर। रगडोनि हाडें करावया चूर। खेंव[10] देतां पैं सत्वर। अति विचित्र तेथें झालें ॥४८॥ विसां भुजांचें बंधन। द्विभुजी सांडिलें आकळून। कळ लागली दारुण। दशानन कुसमुसी ॥४९॥ कळ लावितां दारुण। न वांचे रावणाचा प्राण। सुग्रीवें देतांचि सोडून। पुढती रण करूं आला ॥५०॥ उरीं उराड हाणिती देखा। शिरीं शिरासी हाणिती थडका। दंडीं मुंडपीं हाणिती ढका। लाविती सडका पदबंधें ॥५१॥ पदबंधाच्या कुसरीं[11]। भिडतां गोपुरवेदिकेवरी। दोघे जण एकसरीं। धरेवरी आदळले ॥५२॥ सर्वेचि उठोनियां जाण। वोटवडीचें दाविती रण। हिंका दाविती थरकोन। मुष्टिपात न उचाटे ॥५३॥ उलट लोट विकट रण। हेटकीचें युद्ध दारुण। विविध बंधांचें निर्वाण। रणविंदान दोघांचें ॥५४॥

रणविद्या व मल्लविद्या : दोघे राजे व्यमधारी। शिक्षा दीक्षा जाणोनि खरी। भवंडितां चक्राकारीं। नये गिरिगिरी भवंडीचे ॥५५॥ रणविद्येचा उद्बोध। युद्ध करितां न बाधी खेद। युद्धसमयीं परम आल्हाद। दोघां रणमद युद्धाचा ॥५६॥ गजदंतीं गज जाण। युद्ध करिती खणाण। तेंवीं हे वीर दोघे जण। करिती रण बाहुबळें ॥५७॥ दोघां दुर्धर रणकल्लोळ। दोघीं

**शब्दार्थ :** १. लागले असता, २. दोघाकडील प्रमुख वीर, ३. कमरेत, ४. लाथा, ५. जमिनीवर, ६. आकाशात संचार करणारा. ७. बंधन, ८. अवसान, ९. लत्ता, १०. आलिंगन, ११. युक्तीने

युद्ध केलें चिरकाळ। दोघां श्रम नाहीं अळुमाळ[1]। दोघे प्रबळ युद्धार्थी। ।५८।। दाविती क्रौंचाकार मंडळ। चक्राकार फिरती प्रबळ। रंजककार[2] उपटिती सबळ। रण तुंबळ कंदनप्राय।।५९।। युद्ध करितां मृगगती। सवेंचि दाविती छागगती[3]। निराधारें श्येनगती[4]। दोघे गजगतीं दाविती रण।।६०।। कुक्कुटाचिये निजगतीं। युद्धीं माघारे न सरती। नातरी केसरीच्या स्थितीं। उडी घालिती साटोपें।।६१।। दोघां पूर्ण युद्धव्युत्पत्ती। नाना मंडळें नाना गती। दोघे जण रणमारार्थी। निजविजयार्थी उन्मत्त।।६२।।

तौ परस्परमासाद्य यतावन्योन्यसूदने । मार्जाराविव भक्षार्थे वितस्थाते मुहुर्मुहुः।।१८।।
मंडलानि विचित्राणि स्थानानि विविधानि च। परिमोक्षं प्रहाराणां वर्जनं परिधावनम्।।१९।।

मल्लविद्येच्या विंदानीं। दोघे भिडती सर्वांगग्रहणीं।। येरयेरांतें मारावें रणीं। घाय निर्वाणीं हाणिती।।६३।। तिरकस तिरकस थरकती। चक्राकृती झोले देती। पदाभिघाताच्या व्युत्पत्ती। घाय चुकविती तळपोनी।।६४।। बिडाळ[5] बिडाळाच्या परी। गुरगुरती एकएकांवरी। तैसेचि हेही परस्परीं। येरयेरांवरी मिसळले।।६५।। छागाच्या परी मागें सरती। सवेंचि येऊनि दोघे भिडती। नाना परींच्या गति विगती। रणव्युत्पत्ती मारांगी।।६६।। स्थान मान विविध गती। नाना मंडळें व्युत्पत्ती। गोमूत्रिकावक्र गती। दोघे दाविती थरकोनी।।६७।। युद्धामाजील गतागत। येरयेरांवरी उसळत। येरयेरांतळीं तळपत। पदाभिघात पदबंधें।।६८।। एक एकातें पाडोनि अवनीं[5]। दिसे जैसा मारिला रणीं। तंव तो पादाघातें उलथोनी घोळसी धरणीवरी[6] लातें।।६९।। भिडती पडती तडकती। तळीं तळपोनि उसळती। येरयेरांतें आकळिती। कळा लाविती वर्मस्थ।।७०।। वर्मी लाविताती कळे। वीर उलथोनि आदळे। आदळला तो सवेंचि उसळे। वक्षःस्थळें ताडिती।।७१।। अष्टांगें मोकळीं सोडिती। सवेंचि तळाघातें पाडिती। येरयेरांतें आंसुडिती। झिंझाडिती सर्वांगें।।७२।। धरणें मारणें सोडणें। सवेंचि पदबंधें पाडणें। अष्टांगेंसीं झाडणें। आंसुडणें आक्रोशें।।७३।। झाला युद्धाचा शेवट। ऐसें वानिती सुर वरिष्ठ। तरी दोघे वीर उद्भट। कडकडाट युद्धाचा।।७४।।

अभिद्रावणमाप्लावमवस्थानं सविग्रहम् । परावृत्तपावृत्तमपद्रुतमवप्लुतम्।।२०।।
उपन्यस्तमपन्यस्तं युद्धमार्गविशारदौ । तौ विचेरतुरन्योन्यं वानरेंद्रश्च रावणः।।२१।।
एतस्मिन्नंतरे रक्षो मायाबलमथात्मनः। आरब्धुमुपसंपेदे ज्ञात्वा तं वानराधिपः।।२२।।
उत्पपात तदाकाशं जितकाशी जितक्लमः। रावणः स्थित एवात्र हरिराजेन वंचितः।।२३।।

दोघे आवेशें धांवती। वोसरोनि आदळिती। प्रतिज्ञेच्या ठाया नेती। तेथें बैसविती साटोपें।।७५।। बैसलिया ठायाप्रती। उठतां नुठवे निजशक्तीं। येणे बळें पैं दाटती। शौर्यशक्ति साटोपें।।७६।। पाठिमोरे तळपती। सवेंचि संमुख भिडती। येरयेरांतें कांपविती। मग पाडिती साटोपें।।७७।। पडतपडतांचि क्षितीं[7]। दोघे गगना उसळती। थरकती चवकती सरकती। नाना व्युत्पत्ती[8] युद्धाची।।७८।। गुडघा कोंपर मुष्टिघात। मुंडपीं मुंडप मुरडित। ते ते घाय शून्य करित। अंग चुकवित लघुविद्या।।७९।। दोघे वीर विचक्षण[9]। दोघे युद्धीं अति प्रवीण। दोघे करितां निर्वाण[10]। सुग्रीवें रावण क्षीण केला।।८०।। रावणें आणोनि मायाशक्ती। सुग्रीव धरावा कपटगतीं। जाणोनि कपिपतीं। केली युक्ती ते ऐका।।८१।। बाहु बाहूसीं कवळित। पदीं पदा आकळित। शिरीं शिरातें आदळत। पुच्छ नाकांत सुदलें।।८२।। रावण सटसटां शिंकी। सुग्रीव हाणी बुक्या बुकी। तेणें लंकेश अति दुःखी। अधोमुखीं

शब्दार्थ : १. अल्पही, २. सुरुंगाप्रमाणे, ३. मेंढ्याची गती, ४. ससाण्याची गती, ५. मांजर, ६. जमिनीवर, ७. पृथ्वीवर, ८. माहिती, ९. हुशार, १०. निकाराचे युद्ध.

पाडिला ॥८३॥ दहाहीं कंठीं तत्काळ । पुच्छें लावोनियां कळ। रावण सर्वांगें विकळ । पाडिला तत्काळ सुग्रीवें ॥८४॥

**शेवटी रावण मूर्च्छित : त्याला ठार करावयाचे नसल्याने सुग्रीव त्याचा मुकुट घेऊन येतो :** रावण पडिला अचेतन। यासी मारितां न लगे क्षण। जीवें मारितांचि रावण। राम संपूर्ण क्षोभेल ॥८५॥ श्रीरामें वाहिली असे आण। स्वहस्तें मारावा रावण। त्यासी मारितां आपण। श्रीराम दारुण कोपेल ॥८६॥ श्रीरामाची हे प्रतिज्ञा। मिथ्या करणें हे अवज्ञा। हें कळलें सुग्रीव सर्वज्ञा। दशानना न मारीच ॥८७॥ मारितांचि रावणासी। द्रोही व्हावें श्रीरामासीं। वृथा अंतरणें सेवेसी। यालागीं त्यासी न मारीच ॥८८॥ रणीं गांजोनि रावण। मुकुट घेवोनियां जाण। सुग्रीव जातों मी आपण। केलें गर्जन लंकेसीं ॥८९॥ इंद्रजित आणि कुंभकर्ण। निधडे वीर प्रधान। ज्यांसीं असेल आंगवण। करावया रण तिंहीं यावें ॥९०॥ कुंभकर्ण निद्रापन्न। इंद्रजित थाकें कंपायमान। लपाले ससैन्य प्रधान। पडिलें मौन राक्षसां ॥९१॥ ऐसें गर्जोनि लंकेसीं। घेवोनि रावणाचे मुकुटासी। सुग्रीव उडाला आकाशीं। श्रीरामापासीं यावया ॥९२॥ सुग्रीव निधडा, वीर परम । नाहीं संग्रामीं स्वेद[1] श्रम। अपार क्रमोनियां व्योम[2]। आला श्रीराम ठाकूनी ॥९३॥ मूर्च्छित पाडोनियां रावणासी। मुकुट घेतला न कळतां त्यासीं। सुग्रीव आला श्रीरामापासीं। विजयाभिनिवेशीं डुल्लत ॥९४॥

> अथ हरिवरनाथः प्राप्तसंग्रामकीर्तिर्निशिचरपतिमाजौ योजयित्वा श्रमेण।
> गगनमतिविशालं लंघयित्वार्कसूनुर्हरिगणबलमध्ये रामपार्श्वे जगाम ॥२४॥
> इति स सवितृसूनुस्तत्र तत्कर्म कृत्वा पवनगतिरनीकं प्राविशत्संप्रहृष्टः।
> रघुवरनृपसूनोर्वर्धयन्युद्धहर्षं मृगतरुगणमुख्यैः पूज्यमानो हरिंद्रः ॥२५॥

**सुग्रीवाचा जयजयकार, सर्वांना आनंद :** वानरांचा राज्यधर। जो कां सुग्रीव राजेंद्र। तेणें संग्रामीं दशशिर। स्वयें दुर्धर जिंकिला ॥९५॥ जो नाटोपे सुरां असुरां। जो नाटोपे यक्षकिन्नरां। जो नाटोपे नृपां नरवरां। जो विखारां नाटोपे ॥९६॥ नाटोपे दानवां घोरांदरां। नाटोपे दैत्यां दुर्धरां। ज्याचा त्रैलोकीं दरारा[3]। त्या दशशिरा जिंकिलें ॥९७॥ सुग्रीवसंग्रामाची कीर्ती। असुर सुर नर वानिती। येवढी पावोनि विजयकीर्ती। आला कपिपति[4] रामाजवळी ॥९८॥ उडोनियां सावकाशीं। अपार क्रमोनि आकाशीं। सुग्रीव आला कपिसेनेसीं। श्रीरामासी वंदावया ॥९९॥ सुग्रीव जो कां सूर्यसुत। रावणविजयें अति विख्यात। वंदावया श्रीरघुनाथ। आर्तभूत[5] स्वयें आला ॥१००॥ रावणाच्या मुकुटासी। ठेवोनि श्रीरामपायांपासीं। सुग्रीव लागला पायांसी। अति उल्हासीं स्वानंदें ॥१॥ देखोनि सुग्रीवाची ख्याती। एकांगे जिणोनि लंकापती। तेणें वानर उल्लासती। पायां लागती जयशब्दें ॥२॥ विजयी जाला सुग्रीववीर। सुखावला श्रीरामचंद्र। वानरांचा जयजयकार। केला गजर हरिनामें ॥३॥ श्रीरामाच्या कृपादृष्टीं। सुग्रीवासी विजयपुष्टी। एकला न माये सृष्टीं। स्वानंदकोटिआल्हादें ॥४॥ रघुवंशींचां रघुनाथ। त्यासी द्यावया सुखार्थ। सुग्रीवें जिंकिला लंकानाथ। तेणें कपि पूजित कपिनाथा ॥५॥

> अथ तस्मिन्निमित्तानि दृष्ट्वा लक्ष्मणपूर्वजः। सुग्रीवं संपरिष्वज्य रामो वचनमब्रवीत् ॥२६॥
> असंमन्त्र्य मया सार्द्धं तदिदं साहसं कृतम् । एवं साहसमत्युग्रं न कुर्वंति जनेश्वराः ॥२७॥
> संशये स्थाप्य मां चेदं बलं चेमं बिभीषणम् । कष्टं कृतमिदं वीर साहसं साहसप्रिय ॥२८॥
> इदानीं मा कृथा वीर एवंविधमरिंदम। त्वयि किंचित्समापन्ने किं कार्यं सीतया मम ॥२९॥
> भरतेन महाबाहो लक्ष्मणेन बलीयसा। शत्रुघ्नेन च शत्रुघ्न स्वशरीरेण वा पुनः ॥३०॥

---

**शब्दार्थ :** १. घाम, २. आकाश, ३. भीती, ४. सुग्रीव, ५. उत्सुक,

परवानगीशिवाय गेल्याबद्दल श्रीराम सुग्रीवाची कानउघाडणी करतात : युद्धाभिघात कपिपती। तें देखोनि रघुपती। आलिंगोनि अति प्रीतीं। काय त्याप्रती बोलत।।६।। सुग्रीव राजा तूं आपण। मजसीं न पुसतांचि जाण। एकल्या जावोनि केलें रण। धुरेचें लक्षण हें नव्हे।।७।। आजि माझें भाग्य समर्थ। जें तूं आलासी जीवें जीत। जैं तुज मारिता लंकानाथ। तैं मज प्राणांत ओढवता।।८।। भिडतां सुग्रीव लंकानाथ। मज निःसंदेहो पैं प्राणांत। बिभीषणासी अति कल्पांत। वृथा पुरुषार्थ संग्रामीं।।९।। एकाकी संग्रामागोष्टी। हे तंव तुझी बुद्धि खोटी। असतां सैन्य कोट्यानुकोटी। वृथा अटाटी[1] का केली।।११०।। सुग्रीवा मारिल्या शरणागता। भरत शत्रुघ्न तिघी माता। प्राप्त जालियाही सीता। प्राण सर्वथा राखीना।।११।। शरणागताचें जें मरण। तेंचि माझें प्राणोत्क्रमण। सखा असतांही लक्ष्मण। प्राण सर्वथा राखितोंना।।१२।। मज सांडितांचि प्राण। निमती[2] सीता लक्ष्मण। निमते भरत शत्रुघ्न। सूर्यवंशी कंदन सर्वांतें।।१३।। रावण सुग्रीव करिता घात। तैं सूर्यवंशा होता अंत। दैवें चुकविला कुळकंदनार्थ। पुढें ऐसें कृत्य न करावें।।१४।। सुग्रीव युद्धीं अति समर्थ। तुझा जाणें मी पुरुषार्थ। जेणे होय कुळकंदनार्थ। तैसा अनर्थ न करावा।।१५।।

> तमेवंवादिनं रामं सुग्रीवः प्रत्यभाषत । तव भार्यापहर्तारं दृष्ट्वा राघव रावणम्।।३१।।
> मर्षयामि कथं वीर ज्ञात्वा पौरुषमात्मनः। इत्येवंवादिनं वीरमभिनंद्य स राघवः।।३२।।
> लक्ष्मणं लक्ष्मिसंपन्नमिदं वचनमब्रवीत्।।३३।।

सुग्रीव क्षमा मागतो : ऐकोनि श्रीरामाचें वचन। सुग्रीवे घातलें लोटांगण। मस्तकीं वंदोनियां चरण। काय आपण बोलत।।१६।। तुझी भार्या चोरोनि नेतां। त्या देखोनिं लंकानाथा। धीर न धरवेचि पुरुषार्था। करावया घाता खवळलों।।१७।। पूर दाटला पुरुषार्था। तुज पुसावें नाठवे चित्ता। रणीं मारावें लंकानाथा। सवेग या अर्था उडालों।।१८।। अंगीं असतां आंगवण। धीर न धरवे अर्धक्षण। हेचि पुरुषार्थाचें लक्षण। सत्य जाण श्रीरामा।।१९।। ऐकोनि सुग्रीवभाषण। पुरुषार्थाचें निजलक्षण। तेणें संतोषोनि रघुनंदन। दे आलिंगन स्वानंदें।।१२०।। लक्ष्मणा लक्ष्मीवंता। सुग्रीवा निजविजयार्था। फळें पुष्पें अति उत्तमता। होय अभिषिंचिता श्रीराम।।२१।। एका जनार्दना शरण। जालें सुग्रीवरावणरण। पुढें करील श्रीरघुनंदन। रणकंदन अवधारा।।१२२।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सुग्रीव-रावणयुद्धप्रसंगो नाम पंचमोऽध्यायः।।५।। ओंव्या।।१२२।। श्लोक।।३३।। एवं।।१५५।।

## अध्याय सहावा

।। श्रीसद्गुरुरामचंद्रायनमः ।।

### शिष्टाईसाठी अंगदाचे जाणे

रक्ताचे पाट पाहून श्रीरामांचा कळवळा : पूर्वप्रसंगीं रणांगणीं। वानरीं मारिल्या वीरश्रेणी[3]। रुधिर प्रवाह देखोनि धरणीं। श्रीराम मनीं कळवळला।।१।।

सर्व बंदोबस्त करून नंतर पुढील योजनेचा बेत : कृपा उपजली रघुनाथा। एकाचिया अपकारता[4]। करूं नये सकळांच्या घाता। राजधर्मता हे नव्हे।।२।। सुग्रीवराजा आणि जांबवंत। अंगदादि वानर समस्त। नळनीळादि हनुमंत। शरणागत बिभीषण।।३।।

---

शब्दार्थ : १. त्रास, २. मरण पावले असते, ३. (राक्षसांचे) वीरसमुदाय, ४. अपराधामुळे.

राघवः सन्निवेश्यैवं स्वसैन्यं रक्षसां वधे । संमंत्र्य मंत्रिभिः सार्धं निश्चित्य च पुनःपुनः ॥१॥
आनंतर्यमभिप्रेप्सुः क्रमयोगार्थतत्त्ववित् । बिभीषणस्यानुमते राजधर्मनुस्मरन् ॥२॥

दुर्गपरिधी[1] द्वारबंध। करावया राक्षसांचा वध। सैन्य ठेविलें सन्नद्ध[2]। वीर विविध आतुर्बळी ॥४॥ याउपरी काय कर्तव्यता। श्रीराम पुसे समस्तां। अवघे म्हणती रघुनाथा। युद्ध तत्त्वतां करावें ॥५॥ तुम्ही वृद्ध वृद्ध धर्मयुक्त। सुबुद्धि बुद्धिवंत। या पुढील कर्तव्यार्थ। सुनिश्चित मज सांगा ॥६॥ वानरभाराच्या गजरीं। सेतु बांधोनि सागरीं। रावण मारावया सहपरिवारीं। लंकेवरी आम्ही आलों ॥७॥ ससैन्य मारावें लंकानाथा। विचार कायसा पैं आतां। ऐसें समस्तीं सांगतां। तें रघुनाथा न मानेचि ॥८॥

शिष्ट पाठविण्याची सूचना : जे राजधर्म वेद[3]विहित। तेणेंचि साधे परमार्थ। ऐसे धर्म श्रीरघुनाथ। उपपादित[4] सच्छास्त्रें ॥९॥ अतिशयेंसीं अति समर्थ। शिष्ट धाडावा लंकेआंत। ऐसें बोलतां श्रीरघुनाथ। वानर समस्त क्षोभले ॥१०॥

त्याला कांही वानरांचा विरोध : आमची चोरोनि नेली सीता। आम्हींच शिष्ट पाठवावा आतां। हें तंव अयुक्त रघुनाथा। युद्ध करितां भय काय ॥११॥ नाहीं पां हटलों रणें। नाहीं युद्धीं आलें उणें। याहीवरी शिष्ट धाडणें। लाजिरवाणें आम्हासी ॥१२॥

श्रीराम त्या वेळी चार प्रकारचा युद्धधर्म सांगतात : ऐसें बोलतां समस्त। श्रीराम सांगे राजधर्मार्थ। भूतदया आणि परमार्थ। समचित्त उपपादी ॥१३॥ युद्धधर्म चतुर्विध। साम दाम दंड भेद। अनादिसिद्ध हे प्रसिद्ध। ऐका विशद विभाग ॥१४॥ धुरेचे[5] आंगीं गाढेपण। तेथें युद्ध करी कोण। गज वाजी[6] रथ देवोनि धन। शत्रु बुझावून बोळवावे ॥१५॥ नातरी देवोनि देशदुर्ग। वांचवावें धुरेचें अंग। या नांव गा दानप्रयोग। भेद विभाग तो ऐका ॥१६॥ पडल्या धुरेसीं दारुण युद्ध। नाहीं सेनानी सैन्य सन्नद्ध। तेणें परसैन्या करोनि भेद। करावें युद्ध तदन्वयें[7] ॥१७॥

सामाचा महिमा : भेदाचियां अनुवृत्तीं[8]। रणीं परचक्रा लाविती ख्याती। ऐसी भेदाची गती। सामस्थिती ते ऐका ॥१८॥ युद्धसमयीं सामानुक्रम। हा मुख्यत्वें राजधर्म। सामीं भूतदयासंभ्रम[9]। साम तो परम परमार्थ ॥१९॥ साम न करितां जाण। युद्ध करितां दारुण। असंख्य मरती प्राणिगण। ते हत्या कोण सोशील ॥२०॥ स्वयें साम न करितां। साम मानी जो सर्वथा। भूतहत्या त्याचे माथां। राजधर्मता सुनीती ॥२१॥ श्रीराम स्वयें परब्रह्म। अनुवादला राजधर्म। तेचि भूतदया निःसीम। परमार्थ परम संग्रामीं ॥२२॥ करितां युद्ध रणकंदनार्थ। तेथेंचि लाभे पैं परमार्थ। ऐसें बोलतां रघुनाथ। वेद विस्मत विरिंचि ॥२३॥ स्वधर्म बोलतां रघुपती। चाकाटला बृहस्पती। चाकाटल्या वेदश्रुती। टकमकती शास्त्रार्थ ॥२४॥

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमांल्लोकान्न हंति न निबध्यते ॥३॥

अहंकार सोडून युद्ध केले तर दोष लागत नाही: गीतेमाजी श्रीभगवंत। युद्धीं बोलिला परमार्थ। तोचि अनुवादे श्रीरघुनाथ । तोचि श्लोकार्थ अवधारा ॥२५॥ ज्यांसी नाहीं रणाभिमान। कर्मीं नाहीं कर्माभिमान। ज्यांसी देहीं नाहीं देहाभिमान। ते तूं जाण नित्यमुक्त ॥२६॥ ते जें जें करिती कर्माचरण। ते तें कर्मचि होय ब्रह्मपूर्ण। त्यांसी नाहीं दोषदर्शन। चैतन्यघन निजदृष्टीं ॥२७॥ ज्यांच्या बुद्धीच्या पैं ठायीं। देह देही दोनी नाहीं। कर्मबाध त्यां न बाधी कांहीं। देहीं विदेही ते पुरुष ॥२८॥ ऐशा पुरुषीं करितां रण। मरतें मारिते नाहीं जाण। ठसठसावोनि पूर्ण। करिती रण रणमारें ॥२९॥ ब्रह्म पावोनि तटस्थ जाला। तो तंव सत्वगुणें

शब्दार्थ : १. किल्ल्याचा घेर, २. तयार, ३. वेदांना मान्य, ४. सांगू लागला, ५. शत्रू प्रबल असल्यास, ६. घोडे, ७. त्या उपायास अनुसरून, ८. अंगीकार, ९. सर्व प्राण्यांवर दया.

प्राशिला। त्रिगुणां जिणोनि[1] दादुला। युद्धीं तगटला[2] तो शूर॥३०॥ समूळ स्वधर्माची कथा। स्वयें सांगतां श्रीरघुनाथा। अति विस्मय हनुमंता। जांबवंता ताटस्थ्य॥३१॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन। हनुमान घाली लोटांगण। अंगदसुग्रीवादि बिभीषण। वानरगणसमयोगें॥३२॥

सर्वांना आश्चर्य श्रीरामांना वानर अनुकूल : येथोनियां श्रीरघुनाथा। आमच्या युक्ति खुंटल्या आतां। तुझ्या मानेल अनुमता। त्या कार्यार्था तूं करीं॥३३॥

शिष्ट कोणाला धाडावें ? तो कसा असावा : ऐकोनि वानरांचें वचन। स्वयें पुसे पैं सर्वज्ञ। शिष्ट पाठवावा कोण। तो निवडून मज सांगा॥३४॥ शिष्ट नसावा महाभेड। शिष्टें न धरावी भीड। शिष्ट बोलला सुघड। निधडा प्रौढ निजबळें॥३५॥ शिष्ट नसावा कानकुडा[3]। शिष्ट नसावा प्रेमळ गाढा। शिष्ट नसावा ज्ञानमूढा। पाहिजे निधडा[4] अति योग्य॥३६॥ शिष्ट पाहिजे अति चतुर। उत्तरीं देणें प्रत्युत्तर। राहोनिया धुरेसमोर। अति प्रखर बोलका॥३७॥ धुरेसंमुख बोलतां। सभाक्षोभ नुपजे चित्ता। आपुल्या दावोनि पुरुषार्था। स्वामिकार्यार्था साधक॥३८॥ दूत पाहिजे अत्यंत लाठा। क्षोभल्या गांजी दशकंठा। रावणसभेचा उन्मादताठा। जो वांटीव पाटा रणमर्दें॥३९॥ श्रीरामीं सर्वज्ञत्व चोखडें। आम्ही तंव वानर माकडें। काय बोलावें तुजपुढें। जेंवी सूर्यापुढें खद्योतें॥४०॥ जे बदलासी दूतकथा। जो लक्षेना आमुच्या चित्ता। जो तुज मानेल रघुनाथा। त्यासी तत्वतां धाडावें॥४१॥

हनुमंतापासून सुग्रीवापर्यंत सर्वांचा विचार : शिष्ट धाडावा हनुमंता। येणें गांजिलें लंकानाथा। लंका जाळून आला आतां। त्यासी सर्वथा नये धाडूं॥४२॥ नीळ दूत विचक्षण। बोलूं जाणे सुलक्षण। त्याच्या ठायीं अवलक्षण। अति अवगुण तो एका॥४३॥ शिष्टाई न घेतां रावण। नीळ न परते आपण। त्यासींच करील रणकंदन। बळाभिमान बळदर्प॥४४॥ नळही त्याचसारिखा। न कळे स्वामिकार्याचा आवांका। जावोनि झोंबेल दशमुखा। बाहुबळें देखा मारावया॥४५॥ दूत पाठवावें दधिमुखा। संधि न माने दशमुखा। तो पावोनियां अति दुःखा। मर्दिल लंका अविवेकें॥४६॥ दूत पाठवावा जांबवंत। अति वृद्ध पायीं अशक्त। तो अतिमंत्री बुद्धिवंत। असावा सतत मजपासीं॥४७॥ दूतत्वें धाडूं पनस। परी तो अतिशयें कर्कश। नेणे सदुक्ति अनुप्रवेश। झोंबेल उदास दशकंठा॥४८॥ दूत धाडितां कुमुद। करील रावणासीं विवाद। बोलता बोलता चढेल क्रोध। करील उपमर्द[5] लंकेशा॥४९॥ दूत पाठवावा सुषेण। चतुर बोलका सुलक्षण। संधि न मानितां रावण। देईल प्राण सीतेसाठीं॥५०॥ श्रेष्ठत्वा दूत केसरी। त्यासीं रावणाचा राग भारी। सर्पमुंगुसांच्या परी। परस्परें भिडतील॥५१॥ मैंद द्विविद रंभ पद्माक्ष। ऋषभ शरभ गवय गवाक्ष। नेणतां शिष्टाईचा पक्ष। अतिदक्ष संग्रामीं॥५२॥ इतर जे जे वानरवीर। नेणती शिष्टाईचा प्रकार। मारावया दशशिर। अवघे सत्वर उठती॥५३॥ सुग्रीव मुख्य वानरराजा। धाडूं नये दूतकाजा। दूत लक्षावया दशरथात्मजा। वानरसमाजा शोधित॥५४॥ दूत पाठवितां बिभीषण। अवश्य मारील रावण। मग मज देणें प्राण। हेहीं आपण नये करूं॥५५॥

हनुमंत अंगदाचे नाव सुचवितो. अंगदाचे गुणवर्णन : तंव बोलिला हनुमंत। विनंती परियेंसीं श्रीरघुनाथ। युवराजा अति विख्यात। दूतकार्यार्थ साधील॥५६॥

---

शब्दार्थ : १. जिंकून, २. टिकला, ३. लाजाळू, ४. बळकट, ५. अपमान.

वेदेंदुपद्ममितवानरवाहिनीयं प्रोढप्रतापनिधयः कपयोऽत्र सर्वे।
तत्रापि च प्रखरबुद्धिवचःप्रतापं जानेंऽगदं रघुपते तव दूतयोग्यम्॥४॥

हनुमान म्हणे रघुनंदना। मुख्य मुख्य धुरांच्या गणना। वीस पद्मे संख्या जाणा। आंगवणा आतुर्बळी॥५७॥ यांहीमाजी वाळिसुत। अंगद अति बळें विख्यात। रावणाच्या सभेआंत। अति समर्थ बोलावया॥५८॥ बोलतां राक्षससभेमधीं। सभाक्षोभ यासीं न बांधी। शत्रुवाक्यें वाक्यें निषेधी। अतिसुबुद्धि बोलका॥५९॥ अंगद बोलका निघरघट[१]। अंगद वीर धीर सुभट। अंगद गांजूं शके दशकंठ। वीर वरिष्ठ अंगद॥६०॥ अंगदामाजी परमधीर। अंगद अतिशयेसीं शूर। अंदाचा निजनिर्धार। अतिगंभीर क्षीरोद[२]॥६१॥ छळावया रावणाच्या युक्ती। अंगदामाजी अति व्युत्पत्ती[३]। अंगद एकला पुरुषार्थी। रणकंदनार्थी राक्षसां॥६२॥ अंगद निधडा स्वामिकार्यार्थी। अंगदापासीं अनेक युक्ती। अंगदाअंगीं अगाध शक्ती। रणकंदनार्थी राक्षसां॥६३॥ अंगद वाळीचा लाडका सुत। दूतकार्यार्थी योग्य युक्त। ऐसें बोलतां हनुमंत। श्रीरघुनाथ तोषला॥६४॥

अंगदं वालितनयं कौसलेंद्रोऽब्रवीद्वचः। गच्छ सौम्य दशग्रीवं ब्रूहि मद्वचनादिदम्॥५॥
अराक्षसमिमं लोकं तर्कास्मि निशितैः शरैः। न चेच्छरणमभ्येषि तामादाय च मैथिलीम्॥६॥
यद्याविशसि लोकांस्त्रीन्पक्षीभूत्वा मनोजवः। मम चक्षुःपथं प्राप्य न जीवन्प्रतियास्यसि॥७॥

**श्रीराम त्याच्याबरोबर संदेश देतात :** पाचारोनि अंगदासी। श्रीराम आलिंगी हृदयासी। शिष्ट जावोनि रावणापासीं। सांगें हें त्यासी मद्वाक्य॥६५॥ दंडासी कारण मुख्य चोरी। तुवां चोरिली माझी नारी। तुज दंडावया बाणधारीं। आलो मी निर्धारीं सीताकांत॥६६॥ मुख्य परदाराहरण। तुझ्या मरणा हेचि कारण। सुटल्या माझे दुर्धर बाण। तुज कोण राखील॥६७॥ सावध ऐकें दशमुखा। सबंधु सुपुत्र ससैन्यका। अराक्षसी करीन लंका। बाणसंपर्का[४] निजनेटें॥६८॥ लंकेसीं आणोनि माझी कांता। म्हणती श्रीरामा न सुटे सीता। तो मी वधावया आलों लंकानाथा। केउता[५] आता पळसील॥६९॥ सीता अभिलाषितां काका। पाठी लाविली दर्भशिखा। त्यासी पळतां तिहीं लोकां। ठाव देखा न मिळेचि॥७०॥

**सीता परत करावी व शरण यावे :** मग तो मज आला शरण। म्यां वामनेत्र घेऊन। त्याचा वाचविला प्राण। हें विंदान ईषिकेचें[६]॥७१॥ ऐसी दुर्भशिखा दारुण। सुटल्या माझे दुर्धर बाण। पक्षी होवोनि पळतां जाण। जीवें रावण मारीन॥७२॥ त्रैलोक्यां पळतां दिग्पटीं। बाण न सोडी पाठी। आतुडल्या माझे दृष्टीं। दशकंठीं निःपात॥७३॥ काक अपराधी संपूर्ण। मज अनन्य रिघतां शरण। शरणागता नाहीं मरण। मग त्याचा प्राण वांचविला॥७४॥ रावणा तूंही तैसाचि जाण। सीता देवोनि रिघाल्या शरण। लंकाराज्यीं स्थापून। जन्म मरण येवों नेदी॥७५॥

**बिभीषणाला दुसरी लंका देऊ :** बिभीषणा लंकादान। तदर्थी ऐकें सावधान। नवी लंका करून निर्माण। तेथें बिभीषण स्थापीन॥७६॥ सागरीं तारिले पाषाण। त्या मज श्रीरामासीं जाण। करितां नवी लंका निर्माण। अर्ध क्षण लागेना॥७७॥ यालागीं श्रीरामा अर्पितां सीता। स्वस्थ जीवित लंकानाथा। लंका निजराज्य स्वस्थता। श्रीरघुनाथाचेनि धर्मे॥७८॥

**अमृतफळे देऊन अंगदास निरोप :** ऐसें श्रीरामें आपण। स्वमुखें अंगदासी सांगोन। अमृतफळें

शब्दार्थ : १. तरबेज, २. क्षीरसमुद्र, ३. ज्ञान, ४. बाणांच्या योगेकरून, ५. कोठे, ६. दर्भशिखेचे.

देवोनि जाण। करवी गमन लंकेसीं ।।७९।। अमृतफळांचा शकुन। ज्यांसी करवी रघुनंदन। मर्दूनि परांचा मानाभिमान। विजयी पूर्ण तो होय।।८०।।

अंगदाची कृतार्थता : अंगदा तुझी शौर्यशक्ती। धृति कीर्ति सहनशांती। परम पुरुषार्थाची ख्याती। हनुमंतें मजप्रती सांगितली।।८१।। अंगद म्हणे श्रीरघुनाथा। आज्ञा प्रमाण जी समर्था। स्वयें पुरुषार्थ बोलतां। अति मूर्खता येऊं पाहे।।८२।। असो आमुचिया पुरुषार्था। तुझी आज्ञा श्रीरघुनाथा। कार्यसिद्धीचिये माथां । आम्हा विजयता श्रीरामें।।८३।। वानर वनचर पालेखाईर। झाले श्रीरामाचे किंकर। तेणें आमुचा प्रताप थोर। सुरासुर वंदिती।।८४।। श्रीरामा तुझे आज्ञेपुढें । रावण कायसें बापुडें। आजि माझें भाग्य चोखडें। कार्य मजकडे सांगितलें।।८५।। आजि माझे सफलित मनोरथ। स्वयें स्वमुखें श्रीरघुनाथ। मज सांगितला कार्यार्थ। भाग्यवंत मी एक।।८६।। सद्गुरु हनुमंताचा धर्म। मज तुष्टला श्रीरघूत्तम। स्वमुखें सांगे कार्यानुक्रम। भाग्याचा परम मी एक।।८७।। श्रीरामाज्ञा आल्या हाता। साधावया स्वामिकार्यार्था। अति उल्लास अंगदचित्ता। होय निघता लंकेसीं।।८८।। करोनि श्रीरामातें प्रदक्षिणा। लागोनि श्रीरामचरणां। चरणतीर्थ घेवोनि जाणा। लोटांगणा घातलें।।८९।। वंदोनि लक्ष्मण बिभीषणां। लागला सुग्रीवाच्या चरणां। तेणें देवोनि आशीर्वचना। उल्लासें जाणा अनुवादे।।९०।।

श्रीरामादिकांना अंगद वंदन करून निघतो : श्रीरामाज्ञा वंदोनि शिर्शीं[1]। जिवित्व अर्पिलें श्रीरामासी। तुझेनि श्लाघ्यता[2] कपिवंशासी। रामकार्यासी शीघ्र साधीं।।९१।। नळ नीळ जांबवंत सुषेण। इत्यादि वानरगण। लोटांगणें वंदूनि चरण। आज्ञापन पूसत।।९२।। अवघे म्हणती वाळिसुता। मृदु मंजुळ विनीतता। सुखी केलें आम्हां समस्तां। निजविजयार्था तूं लाहसी।।९३।। देखोनि सद्गुरु हनुमंता। अंगदासी उल्लासता। त्याचे चरणीं ठेवोनि माथा। सप्रेमता सद्गदित।।९४।। अंगदा हनुमंताची भक्ती। अंगदा हनुमंतासीं प्रीती। शीघ्र जावया लंकेप्रती। आज्ञा मारुति देतसे।।९५।। अंगदासी हनुमंतें। आश्वासोनि वरदहस्तें। लंकेसी पाठविलें त्यातें। दशमुखातें गांजावया।।९६।। श्रीरामा साष्टांग नमस्कार। अवलोकोनि लंकापुर। करोनि रामनामें गजर। अंगदवीर उसळला।।९७।।

जगामाकाशमाविश्य मूर्तिमानिव हव्यवाट। सोऽभिपत्य मुहूर्तेन श्रीरामद्रावणमंदिरम्।।८।।
ददर्शासीनमव्यग्रं रावणं सचिवैः सह।।९।।

गगनी जातां अंगदवीर। सुग्रीवादि पैं वानर। तिहीं केला जयजयकार। अति गजर नामाचा।।९८।।

आकाशमार्गाने अंगदाचे लंकेकडे [illegible] : जैसा श्रीरामाचा बाण। तैसें अंगदाचें उड्डाण। सत्वर सत्वर करोनियां गमन। आला आपण लंकेसीं।।९९।। आकाशाचिये पोकळी। अंगदें घालोनि पायांतळीं। चढोनि निरालंब निराळीं। लंकेजवळी स्वयें आला।।१००।। बाळसूर्य रसें ओतिला। किंवा अग्नितेजें घडला। तैसा अंगद शोभला। लंके आला दैदीप्यमान।।१।। अंगदाचें निजउड्डाण। लंकेपासीं आले जाण। एका जनार्दना शरण। पुढें निरूपण अति गोड।।२।। अंगदरावणसंभाषण। युक्तिप्रयुक्तीचें छळण। तेंही गोड निरूपण। सावधान अवधारा।।३।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अंगदशिष्टाईगमनं नाम षष्ठोऽध्यायः।।६।।ओंव्या।।१०३।। श्लोक।।९।। एवं।।११२।।

शब्दार्थ : १. मस्तकी, २. मोठेपणा.

## अध्याय सातवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्रायनमः ॥

### अंगदाकडून रावणाची निंदा

अंगदाचे रावणाच्या सभेत उड्डाण : अंगद आकाशमार्गेंसीं। शीघ्र आला तो लंकेसीं। प्रवेशला रावणसभेसीं। अति विन्यासीं[1] तें ऐका ॥१॥

सोऽभिपत्य मुहूर्तेन श्रीमद्रावणमंदिरम् । ददर्शासीनमव्यग्रं रावणं सचिवैः सह ॥१॥
ततस्तस्याविदूरेण निपत्य हरिपुंगवः ॥२॥

सभासद व रावणावर त्याचा परिणाम : रावणसभेपुढें जाण। आलें अंगदाचें उड्डाण। तेणें दचकला दशानन। कंपायमान भयभीत ॥२॥ पडतां अंगदाची उडी। लंका अत्यंत हडबडी। दडाल्या वीरांचिया कोडी। जालीं बापुडीं राक्षसें ॥३॥ करावया अवघ्यांचा घात। पुढतीं आला रें हनुमंत। ऐसा वळसा[2] लंकेआंत। अति आकांत राक्षसां ॥४॥ कपिभयें भयभीत। रावणसभा पैं समस्त। जैसें चित्रींचें लिखित। तैसें तटस्थ अवघेही ॥५॥ अंगदेंसीं स्वयें संमुख। बोलो न शके दशमुख। आणीक कोण बोले मशक। टकमक पाहती राक्षस ॥६॥ होतां अंगदाचें आगमन। राक्षसां पडिलें महामौन। चाकाटला[3] दशानन। तें देखोन कपिबोले ॥७॥ मी तंव सभेचा अतीत[4]। कोणी पुसेना स्वागत। भयभ्रमें अति भ्रांत। निजनिश्चित महामूर्ख ॥८॥ तुम्हा अवघ्यांसीं पडिलें मौन। त्याही मौनाचें कारण। तें म्यां लक्षिलें संपूर्ण। सावधान अवधारा ॥९॥

अंगद त्याचे कारण सांगतो : वानरांच्या निजदळीं। श्रीराम आला आतुर्बळी। तेणें तुम्हां दांतखिळी। वचनावळी खुंटली ॥१०॥ अचुकसंधानी रघुनाथ। देखोनियां छत्रपात। वेडावला लंकानाथ। युक्तायुक्त विसरला ॥११॥ येतां देखोनि रघुनंदन। राक्षससभा आणि प्रधान अवघ्यां पडलें महामौन। वचनावचन खुंटलें ॥१२॥ असो ही श्रीरामाची ख्याती। तुम्हांसी गांजिलें मारुतीं। खुंटली हनुमंतें वचनोक्ती। तेही उपपत्ती अवधारा ॥१३॥

हनुमंताच्या पराक्रमाचा प्रताप : हनुमान अशोक वनीं बळी। केली राक्षसा रवंदळी[5]। तेणें तुम्हां दांतखिळी। वचनावळी खुंटली ॥१४॥ हनुमान पुच्छाच्या निजज्वाळीं। लंका करितां पैं होळी। तेणे बैसली दांतखिळी। वचनावळी खुंटली ॥१५॥ अचुकसंधानी रघुनाथ बळी। कपिपुच्छाच्या निजज्वाळीं। केली राक्षसां रवंदळी। वचनावळी खुंटली ॥१६॥ रावणें फुकितां अग्निज्वाळी। खांडमिशां जाहली होळी। तेणें बैसली दांतखिळी। वचनावळी खुंटली ॥१७॥ हनुमंतें राक्षसांस। रणीं दिधला अति त्रास। तेणें वाचा पडली ओस। कोणी कोणास पुसेना ॥१८॥ लंकेसीं भोवंडोनि आवर्त[6]। आतुर्बळी हनुमंत। कैसा असे रामकटकांत। कपिवृत्तांत अवधारा ॥१९॥

> यो युष्माकमदीदहत्पुरमिदं योऽदीदलत्काननं
> योऽक्षं वीरममीमरद्रिरिगुहां यौऽबीभरद्राक्षसान्।
> सोऽस्माकं कटके कदाचिदपि नो वीरिषु संभाव्यते
> दूतत्वेन इतस्ततः प्रतिदिनं संप्रेष्यते सांप्रतम् ॥३॥

जो कां अशोकवनाआंत। वने उपाडी हनुमंत। करोनि अखयाचा घात। केला निःपात

---

शब्दार्थ : १. अती चातुर्याने, २. भीती धाक, ३. दचकला, ४. पाहुणा, ५. नाश, ६. धुमाकूळ.

राक्षसां ॥२०॥ वनकर किंकर प्रधानपुत्र। हेही मारिले समग्र। गांजोनि इंद्रजित ज्येष्ठ कुमर। सैन्यसंभार निर्दाळिला ॥२१॥ रावण अपमानोनियां भारी। जाळोनिया लंकापुरी। मारोनियां राक्षसहारी। लंकागिरिदरी पूर्ण केली ॥२२॥ राक्षसदातांच्या राशी थोरी। हनुमान मोजी कुडवेंवरी। तो श्रीराम कटकामाझारी। महावीरीं गणिजेना ॥२३॥ सांपेंसांपे[1] पैं देख। चिट्टीपत्रांचे पायिक[2]। लंके धाडिले ते एक रंक। अति मशक हनुमंत ॥२४॥

रावणाची दुरुक्ती : करावया अंगदाचें छळण। दुरुक्तिबोलाचें विंदान। स्वयें अनुवादे रावण। सावधान अवधारा ॥२५॥ सांडूनि दुर्गद्वारभूमी। तूं आलासी अमार्गगामी[3]। यालागीं तुजसी न बोलों आम्ही। मौनानुक्रमीं राहिलों ॥२६॥ अमार्गगाम्यासी संभाषण। हें तंव आम्हांसी अति दूषण। ऐकोनि रावणाचें वचन। हास्यवदन अंगद ॥२७॥

श्लोकार्ध–संपश्यति परं दोषमात्मदोषं न पश्यति ॥४॥

अंगदाची प्रतिक्रिया, रावणाचा उपहास व बळाचा अविष्कार : रावणा ऐक सावधान। देखती पुढिलांचे[4] अवगुण। आपुलें न देखती दूषण। रासभ[5] पूर्ण ते एक ॥२८॥ पुच्छ रासभाचे ठायीं। हे तंव लांडे गधडे पाहीं। स्वधर्मविवेक ज्यां नाहीं। ते नर भुई भारभूत ॥२९॥ वानरां आकाशगमन। हें तंव आमुचें स्वधर्माचरण। स्वधर्मा लाविजे जें दूषण। शूकर श्वान तो एक ॥३०॥ मुख्य अधर्म तस्करपण। तेहीं परदारहरण। खतेला[6] पापी तूं रावण। काळें वदन तिहीं लोकीं ॥३१॥ वेदबाह्य तूं एक जाण। स्वधर्मकर्मीं तुज दूषण। महापापी तूं रावण। काळें वदन तिहीं लोकी ॥३२॥ निकट देखोनि रावण। त्याचें करावया निर्दळण। आलें अंगदासी स्फुरण। रोम संपूर्ण थरकती ॥३३॥ रावण मारीन मारिलिया ठायीं। अवघी खंडली शिष्टाई। म्हणोनि सरसावला पाहीं। आठव कांहीं नाठवे ॥३४॥ अंगद खवळला देखोन। चळीं कांपे दशानन। राक्षस कांपती प्रधान। दुसरें विघ्न हें आलें ॥३५॥ पहिला करोनि गेला होळी। दुसरा आला त्याहूनि बळी। राक्षस कांपती चळाचळीं। आतुर्बळी वानर ॥३६॥ लंका निरोधी श्रीरघुनाथ। निःशंक एकला रामदूत। आम्हांसी करूं आला अंत। चळीं कांपत राक्षस ॥३७॥ अंगदाचें दृष्टीकडे। पाहतां रावण जालें वेडें। राक्षससैन्य तें बापुडें। येर दडे येरामागें ॥३८॥ रावणहंता श्रीरघुनाथ यालागीं न मारीच हनुमंत। मूर्खपणे मी उन्मत्त। लंकानाथ मारूं पाहें ॥३९॥ करितां श्रीरामनामस्मरण। समूळ पळे मूर्खपण। क्रोधानुवृत्तीं[7] गिळोनि जाण। सावधान पैं जाला ॥४०॥ स्वमुखें बोलिला रघुपती। अंगदाअंगीं शौर्य शांती। गिळोनियां क्रोधनुवृत्ती। सभेप्रति बैसला ॥४१॥

तस्य वेदवसुयोजनमानं भद्रपीठमुदवेक्ष्य सुंदरम्।
वायुसूनुरिव पुच्छचिवृद्धिर्यातुधानसममाशु ववर्ध ॥५॥

पुच्छाचे आसनावर बैठक : चौऱ्यायसी संख्या योजन। उंच रावणसिंहासन। अंगदही तत्समान। घाली आसन तें एका ॥४२॥ जेंवी लंकादहनहेत। पुच्छ वाढवी हनुमंत। रावणासम आसनार्थ। पुच्छ पुरुषार्थी अंगद ॥४३॥ पुच्छ वाढवोनियां जाण। त्याचें वेळोनि पुच्छासन। अंगद बैसला आपण। समसमान दशमुखा ॥४४॥ दशमुखेंसीं संमुख। अंगद बैसला निःशंक। रावणा लागली टकमक। अति साशंक राक्षस ॥४५॥ अंगदा येथोनि परता सर। ऐसें म्हणावया दशशिर। न संभवे पैं उत्तर। ऐसा अत्युग्र कपि भासे ॥४६॥ रावणासंमुख सिंहासनीं। अंगद बैसोनि पुच्छासनीं। वाकुंल्या दावी फळें खाऊनी। मिचकावूनी

---

शब्दार्थ : १. सांप्रत, २. सेवक, ३. आडमार्गाने, ४. इतरांचे, ५. गाढव, ६. खट्याळ, ७. रागाचा वेग.

नयनातें।।४७।। अंगद श्रीरामाचा दूत। एकला आलासे सभेआंत। तेणें राक्षसां आक्रांत। भयाकुळित रावण।।४८।।

रावणाच्या प्रश्नाला अंगदाचे उत्तर : अंगद बैसला देखोन। हळूच पुसे दशानन। हनुमान नव्हेसी तरी तू कोण। आगमन किमर्थ।।४९।। ऐसें पुसतां लंकानाथ। अंगद आपुला वृत्तांत। स्वयें असे पैं सांगत। श्रीरघुनाथ स्मरोनी।।५०।।

दूतोऽहं कोशलेंद्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः। वालिपुत्रोंऽगदो नाम यदि ते श्रोत्रमागतः।।६।।

अंगदाची दूताची भूमिका : ज्याचा निर्दुष्ट[1] पुरुषार्थ। जेणे खरदूषणा केला घात। त्या श्रीरामाचा मी दूत। वाळिसुत[2] अंगद।।५१।। मारीच मारिला वनाआंत। ज्या संमुख न ये लंकानाथ। त्या श्रीरामाचा मी दूत। वाळिसुत अंगद।।५२।। कौसल्योदरपंचानन[3]। कौसल्यानंदवर्धन। त्या श्रीरामाचा दूत मी जाण। वाळिनंदन अंगद।।५३।। देवां वाळी दैत्यां वाळीं। सुरां असुरां दानवां वाळी। त्या वाळीचा अंगद बळी । आलों तुजजवळी तें ऐक।।५४।। रावणा सुनी[4] काखेतळीं। सप्तसमुद्रीं केली आंघोळीं। त्या वाळीचा पुत्र अंगद बळी। रामे तुजजवळी धाडिलें।।५५।। दुंदुभी मारिला किष्किंधेजवळी । तत्पुत्र मारिला विवरसमेळीं। त्या वाळीचा पुत्र मी अंगद बळी। रामें तुजजवळी धाडिलें।।५६।। सहा मास निराहारी निरुदक। विवरीं मारिले दैत्य अनेक। त्या वाळीचा मी अंगद देख। रामें आवश्यक मज धाडिलें।।५७।। सीता देवोनि शरणागत। जाहल्या वांचेल लंकानाथ। येरव्हीं त्याचा करीन घात। ऐसें रघुनाथ बोलिला।।५८।।

रावणाची दुष्ट वाणी : छळावया अंगदोक्ती। क्षोभे बोले लंकापती। रावणाच्या छळणोक्ती। अति व्युत्पत्ती अवधारा।।५९।।

रे रे अंगद सांप्रतं तव पिता रामेण हत्वा स्वयं
सत्यं ते मम नारदेन कथितं तारार्पिता सुग्रीवे।
दूतत्वेन कथं न लज्जसि कपे रामस्य लोकस्य
वा भूभार शृणु जीवनं कपिकुले साधर्म्यनष्टाधम।।७।।

धिग् धिग् अंगदा तुझा पुरुषार्थ। धिग् धिग् अंगदा तुझा बळार्थ। जेणें पित्याचा केला घात। त्याचा दूत म्हणविसी।।६०।। संमुख संग्रामीं न करी घात। ठकून मारिला युद्धाआंत। ऐसा नष्ट श्रीरघुनाथ। त्याचा दूत म्हणविसी।।६१।। आणिक एक अभिनव कहाणी। नारदें सांगितलें मजलागूनी। रामें हिरोनि तुझी जननी। केली निजपत्नी सुग्रीवा।।६२।। ठकवोनि केला पित्याचा घात। मातेसी आणिक योजिला कांत। ऐसा नष्ट श्रीरघुनाथ। त्याचा दूत म्हणविसी।।६३।। अंगदा तूं निर्लज्ज मूर्तिमंत। आमचेही सभेआंत। न लाजसी म्हणवितां रामदूत। धिक् पुरुषार्थ अंगदा।।६४।। पोटीं पुत्र व्हावा रूढ[5]। तेणें घ्यावा पित्याचा सूड। तूं तंव जन्मलासि दगड। वृथा माकड श्लाघसी[6]।।६५।। अंगदासारिखा निलाजिरा। पाहतां न दिसे दुसरा। काय मुख दाविसी वानरा। रिघोनि सागरां जीव देईं।।६६।। नातरी करीं आड विहिरी। कां पोटीं घालीं सुरी। जळो तुझी वाढीव थोरी। निंद्य संसारीं तूं एक।।६७।।

भेदनीतीचा अवलंब : छळणा[7] बोले लंकानाथ। अंगदा तूं सभाग्यवंत। मज रावणासी जाहल्या शरणागत। अभयहस्त तुज माझा।।६८।। साधावया पितृकार्यार्थ। मिथ्या म्हणविसी रामदूत। हाही कळला तुझा वृत्तांत। शरणागत तूं माझा।।६९।। सूड घ्यावा पिता वाळी।

शब्दार्थ : १. दोषरहित, २. वालिपुत्र, ३. कौसल्येपोटी जन्मलेला सिंह, ४. घालून, ठेवून, ५. प्रख्यात, ६. स्तुती करतोस, ७. कपटाने.

शरण आलासी मजजवळी। मी रावण आतुर्बळी। तुज तत्काळीं कुढावीन[१] ॥७०॥ मारोनि श्रीराम लक्ष्मण। करोनि सुग्रीव रणकंदन। अंगदा देईन किष्किंधाभुवन। सत्य वरदान हें माझें ॥७१॥

**त्यावर अंगदाची प्रतिक्रिया :** ऐसें बोलतां दशानन। अंगद झाला हास्यवदन। कैसें देतो प्रतिवचन। सावधान अवधारा ॥७२॥ स्वयंवरीं धनुर्ष्यी वाहतां गुण[२]। सभे पडलासी उलथून। तुझ्या अंगीं नपुंसकपण। केंवी म्यां शरण रिघावें ॥७३॥ स्वयंवरीं श्रीरामें आपण। करितां त्र्यंबक[३]भंजन। रावणाचें काळें वदन। तुज म्यां शरण केंवी यावें ॥७४॥ संमुख न येववे रघुनाथा। मारीचा देवोनि मरणार्था। सीता चोरोनि होसी पळता। शरणागता कोण न राखे ॥७५॥ नपुंसक हीन दीन रावण। त्या तुज मी केंवी रिघावें शरण। उलटें हाणितां चडकाण[४]। धाकेंचि प्राण सांडिसी ॥७६॥ म्हणोनि उचलितां हात। गजबजिला लंकानाथ। अंगदें कोप करोनि शांत। अनुवादत रामाज्ञा ॥७७॥

**रावणाच्या यापूर्वी झालेल्या अपमानित अवस्थांचा झाडा अंगद क्रमाने घेतो :** बहुत ऐकिले रावण। त्यांमाजील तूं कोण। विविध रावणांचें लक्षण। वदे विचक्षण अंगद ॥७८॥ एका रावणाची थोरी। सहस्रार्जुनासी युद्ध करी। तेणें कवळोनि वामकरीं। क्षणामाझारीं धरियेला ॥७९॥

**सहस्रार्जुनाकडून रावणाची शोभा :** सहस्रार्जुन कृपावंत। रावण हीन दीन अशक्त। नगरोद्वंथें संरक्षित। कारागृहांत न घालीच ॥८०॥ दुर्गद्वारपाळ पाचारून। स्वमुखें सांगे सहस्रार्जुन। दहा मुखांचा रावण। बाहेर आपण जाऊ नेदीं ॥८१॥ नगरदुर्गोद्वंधन। पायीं शृंगखलाबंधन। ऐयापरी राखोनि रावण। वाहवी जीवन रेवेचें[५] ॥८२॥ रावणाच्या दाह शिरीं। देवोनियां दहा घागरी। जळ वाहे निरंतरीं। घरोघरीं उदकार्थ ॥८३॥ राजगृहींचें जें भातें। खावया न पुरें रावणातें। दहाही मुखें समसमितें[६]। केलें तेथे तें एका ॥८४॥ बैसोनियां जांत्यावरी। गीत गाय दहाही स्वरीं। कणी कचरडा[७] झाल्यावरी। दहाही शिरीं देती टोले ॥८५॥ कुटका भाकरी हाता येत। रावण धापसे[८] तेथें नाचत। इफिइफि पिंगा गात। मागे भात घरोघरीं ॥८६॥ दाही मुखें दोहरे गात। वीसही नाचवी हात। थै थै थैकार दावित। चणे मागत पसारा ॥८७॥ ताक मागावयालागूनी। श्वानवाणी रासभवाणी। रावण भुंके दहाही वदनीं। दावी रडणी श्वानाची ॥८८॥ सहस्रार्जुनें कानडदेवतेसी। राखण ठेविलें नगरासीं। तिचें रक्षण चौपासीं। अहर्निशीं सावध ॥८९॥ रावण पळतां आकाशगतीं। कानडदेवता रक्षणस्थिती। वेताटी माथां वाजती। पडे क्षितीं मूर्च्छित ॥९०॥ ऐसा सहा महिनेवरी। निर्गम[९] न पुरेचि ते नगरीं। नेसणें फाटल्या उघड्या टिरी। उवा लिखा शिरीं बुचबुचित ॥९१॥ तेथें पौलस्ति पुत्रस्नेहेंसीं। येवोनि सहस्रार्जुनापासीं। मुक्त करवी रावणासी। तंव तो त्यासी नाठवे ॥९२॥ पौलस्तीस पाठवी कारागृहांत। देखें दशमुख असंख्यात। तेणें पौलस्ति अति विस्मित। रावण तेथ असेना ॥९३॥ तंव रावणशिरीं घागरी। थै थै नाचे नानापरी। चण्यावारीं घरोघरीं। देखोनि दुरी पौलस्ति ॥९४॥ रावण धरोनियां हातीं। पौलस्ति नेतां लंकाप्रती। द्वारपाळीं केली विनंती। नव्हे निर्गति अचिन्हीं[१०] ॥९५॥ पौलस्ति पुसे चिन्हसंज्ञा। काळें करोनियां वदना। नाकीं लाविलिया चुना। उद्वंधना[११] निर्मुक्ति ॥९६॥ राजमुद्रा घेवोनि करीं। शीघ्र आलिया नगरद्वारीं। सुखरूप निगमाची थोरी। जाण निर्धारीं ऋषिवर्या ॥९७॥

---

शब्दार्थ : १. रक्षीन, २. दोरी, ३. शिवधनुष्याचा भंग, ४. थप्पड, ५. नर्मदेचे, ६. दुःखाचे, ७. कणीक दळणे, ८. धापा टाकत, ९. सुटका, १०. शरीरावर काही खुणा न करिता, ११. बंधनापासून .

पौलस्ति आणूं गेला मुद्रेसी। रावणें मसी लावोनि मुखासीं। चुना लावोनियां नाकासीं। केला द्वारेसीं निर्गम ॥९८॥ सावध ऐकें लंकापती। ऐसी एक्या रावणाची गती। ऐक दुजियाची स्थिती। ते मी तुजप्रती सांगेन ॥९९॥

बळीच्या राज्यात रावणाची दुर्दशा : दुजा रावण उन्मादबळी। सवेग रिघोनि सुतळीं[1]। रणीं जिणावया बळी। क्रोधानळीं चालिला ॥१००॥ बळिद्वारीं द्वारपाळ वामन। तेणें जावों दिधला रावण। बळीपुढें दशकंठ तृण। लज्जायमान राहिला ॥१॥ बळि आणि विंध्यावळी। सारिपाट खेळती सुखसमेळीं। रावण आलिया जवळी। मशकसमेळीं लक्षेना ॥२॥ रावण दशमुखीं किडें। किंवा आलेंसे घुंगरडें। हें न दिसे बळीपुढें। खेळाकडे विगुंतला ॥३॥ बळि तृणप्राय न गणी। कळलें रावणा मनीं। त्यासी मारावें सिंतरूनी[2]। आवांका धरोनी उभा असे ॥४॥ सारीपाट खेळतां आवेशा। हातींचा गळोनि पडिला फांसा। दे दे म्हणतां लंकेशा। त्यासीं तो सहसा उचलेना ॥५॥ एके हातीं दोहीं हातीं। चहूं हातीं दहाही हातीं। वामनें आकर्षिली शक्ती। विसां हातीं उचलेना ॥६॥ उचलूं जातां लज्जामेळीं। फांसा आदळला कपाळीं। देवोनि आक्रंदें आरोळी। पडिला तळीं मूर्च्छित ॥७॥ रावण पडतांचि भूतळीं। दहाही मुखीं भरली धुळी। देखोनि हांसे विध्यावळी। पिटिली टाळी सेवकीं ॥८॥ रावण पडतां मूर्च्छित। कपाळीं अशुद्ध[3] प्रवाहत। तेणें तो दिसताहे आरक्त। जैसें कां प्रेत अहेवेचें[4] ॥९॥ दहाही शिरें वीस हात। करंटें होणें आणिले येथ। याचें पडो नये रक्त। काढा म्हणे विंध्यावळी ॥११०॥ येवोनि बळीचे सेवक। अलंकार एक एक। वस्त्रें वस्त्रें हिरोनि देख। नेला दशमुख अति दूरी ॥११॥ अति बळेंसीं कुंथत। युद्धा आला लंकानाथ। त्याचा निवडला पुरुषार्थ। विटंबनार्थ तो ऐका ॥१२॥ आगे लंड पिछे गांड। सेवकीं केलें भंडोभंड। रावणाचें काळें तोंड। लज्जावितंड तेणें त्यासीं ॥१३॥ रावण राजा अति समर्थ। न्हावी न मिळेचि तेथ। केश लांब दहा हात। असे दावीत जगासी ॥१४॥ आशीर्वाद दिधला ऋषीं। केशवृद्धि जाली त्यासीं। जो तो रावण उपहासी। उकासाबुकसीं स्फुंदत ॥१५॥

रावणाला त्रस्त करण्यासाठी वामन प्रयत्नशील : रावणाच्या निजमूळीं। वामन लागला समूळीं। तेणें मेळविला धुळी। केली रांगोळी गर्वाची ॥१६॥ लज्जान्वित दशानन। जाऊं पाहे जीव निघोन। वामनें राखिलासे कोंडोन। द्वार धरोन बैसला ॥१७॥ रावण म्हणे वामनासी। तूं कां आता द्वंद्वा चाळिसी। स्फुंदस्फुंदोन रडे उकसाबुकसीं। सोडीं आम्हांसीं जाऊं दे ॥१८॥ वामन म्हणे मी बळीचा सेवक। राजाज्ञेवांचून देख। जाऊं नेदीं राव रंक। व्रत निष्टंक[5] हें माझें ॥१९॥ वामनातें चुकावून। खेचरगती दशानन। जातां गगनीं देखे वामन। पळे परतोन भयभीत ॥१२०॥ पाताळगती करितां गमन। धरधरुनी आणी वामन। भयभीत दशानन। येत परतोन माघारा ॥२१॥ राक्षसां अदृश्यगतीं गमन। अदृश्यद्रष्टा वामन। त्यातें देखोनि रावण। पळे आपण अति धाकें ॥२२॥ पूर्वपश्चिमदक्षिणदिशीं। पळों जातां उत्तरेसीं। वामन कोंदला आकाशीं। देखे दशदिशांसी वामन ॥२३॥ रावण चिंता करितां गहन। चिंतामूळीं देखे वामन। दहाही मुखीं शंखस्फुरण[6]। करी रावण अति भयें ॥२४॥ वामनें पुरविली पाठी। खुंटली निर्गमाची[7] गोष्टी। जाजावोनि[8] दशकंठी। होवोनि[9] हिंपुटीं[9] राहिला ॥२५॥ ठकवोनियां रघुपती। पुढें चोरील सीता सती। तेणें रागें वामनमूर्तीं। परम आपत्ती भोगवी ॥२६॥ निर्गम न लभेचि दशानन। क्षुधेनें पिडिला रावण। चणे मागावया

शब्दार्थ : १. सप्त पातालांपैकी सुतळनामक पाताळात, २. फसवून, ३. रक्त, ४. सुवासिनीचे, ५. पूर्ण, ६. शंखध्वनी, बोंब. ७. मुक्तेची, ८. कष्ट पावून, ९. निराश, कष्टी.

जाण। गेला आपण अश्वशाळे॥२७॥ अश्ववाहकांची कथा। जरी तूं लीद वाहसी माथां। मूठ मूठ चणे देऊं आतां। मानी क्षुधार्त रावण॥२८॥ जंव लागली नाहीं भूक। तंव राजा दशमुख। वामनें चेतविली अधिक। मागवी भीक उदरार्थ॥२९॥ दशमुकुट लंकानाथा। लीद चढती तये माथां। पोट न भरे चणे खातां। दुःखावस्था तळमळी॥१३०॥ कांतन[1] कोष्ट्यासी सांगे लंकानाथ। मज आहेत वीस हात। दहाही राहाटीं कांतीन सूत। अन्न निश्चित मज द्यावें॥३१॥ वाटूं जातां कापुसासी। रावण पडला तोंडघसीं। सरक्या रिघतां नासिकासी। अति लज्जेसीं सलज्ज॥३२॥ कांताया बैसला लंकानाथ। वांकले स्वधर्माचे चात। तुटलें सूक्ष्मत्वाचें सूत। फिसके कांत तडतडां॥३३॥ म्हणती दशमुख खोटा। मोडिलें सत्कर्माचे रहाटा। पिंजिला रूं[2] नाशिला सांटा। देती थापटा नरनारी॥३४॥ नाशिला मुदलींचा सांठा। अवघे मोडिलें राहाटां। दशमुख पोटींचा खोटा। देती चापटा नरनारी॥३५॥ उपाय येती अपायासीं। तेणेंचि न मिळे खावयासी। वामने आपदा लाविली ऐसी। उकसाबुकसीं स्फुदत॥३६॥ लंकापती दशमुखा। मागें पुढें लाविला सुडका। पोटेंवीण केला रोडका। वामनें देखा गांजिला॥३७॥ पहिलें येतां दशानन। वामन हीन दीन। आतां त्याचा प्रताप गहन। तेणे त्रिभुवन व्यापिलें॥३८॥ रात्रीं पळतां रावण। अंधारीं देखणा वामन। तेणें गांजिला दशानन। करी रुदन अति दुःखें॥३९॥ सोडवावया रावणासी। पौलस्ति आला बळीपासीं। अति सन्मानें पूजोनि त्यासी। कार्यार्थासी बळि पुसे॥१४०॥

**पौलस्तिची मध्यस्थी :** पौलस्ति सांगे पैं आपण। तुवां कां रोखिला[3] रावण। ऐकतां ऋषिवचन। अति उद्विग्न[4] बळि जाला॥४१॥ बळीनें वाहिली आण। माझ्या राज्यामाजी जाण। रोगराईचें नाहीं बंधन। बंदिखान येथें कैंचें॥४२॥ कोणे ठायीं कोणें देशीं। कोणें राखिलें रावणासी। शोधोनि आणा मजपासीं। सन्मानेंसीं सोडीन॥४३॥ पौलस्ति स्वयें पाहूं जातां। लिदीच्या पाट्यां दहाही माथां। पोट न भरे खणे खातां। भीक मागतां देखिला॥४४॥ दहाही मुखीं भुंके रावण। खंडेरायाचें होवोनि श्वान। हडहड करितां जन। लज्जयमान पौलस्ति॥४५॥ भुंकिन्नला होवोनि श्वान। पौलस्ति देखतां आपण। तेणें रावण लज्जायमान। अधोवदन राहिला॥४६॥ पौलस्ति पुसे रावणासी। एवढ्या लावोनि आपदांसी। येथें कां बळीनें राखिलासी। अति लज्जेसीं सांगत॥४७॥ वामनें घालोनि अटका। मागे पुढें लावोनि सुडका। क्षुधा तृषा केला रोडका। अति दुःखें देखा गांजिलें॥४८॥ वामनापासीं विद्या सकळ। वामनापुढें न चले बळ। म्यांहीं विद्या करितां प्रबळ। न चले छळ[5] वामनासीं॥४९॥ कार्य नाहीं बळीपासीं। आज्ञा पुसिल्या वामनासीं। सुखेंचि आहे निर्गम आम्हांसी। पौलस्तिसी सांगितलें॥१५०॥ मग घेवोनियां पुत्रासी। पौलस्ति आला वामनापासीं। आज्ञा द्यावी रावणासी। निजनगरासी न्यावया॥१५१॥ पौलस्ति येतांचि आपण। वामनें घातलें लोटांगण। मस्तकीं वंदोनियां चरण। धर्मवचन अनुवादे॥५२॥ मी तंव बळीचा सेवक। द्वारपाळ प्रतिहारक। आज्ञेवेगळा एकाएक। राव रंक जाऊं नेदीं॥५३॥ राजाज्ञा आणिलिया जाण। सुखेंचि मरावें गमन। नाहीं तरी केलिया चिन्ह। निर्गमन राजाज्ञा॥५४॥

**राजाज्ञा किंवा वामनाच्या अटी :** पौलिस्ता पुसे कैसें चिन्ह। वामन सांगे संतोषोन। दहाही मस्तकां वपन। आणि मुंडण खांडमिशां॥५५॥ काळें करोनि दशवदन। दहाही नाकीं कवड्या बांधोन। वदनीं श्वेत पीत लेखन। निर्गमन येचिं चिन्हीं॥५६॥ पौलस्ति म्हणे रावणासी। जाऊं चाल बळीपासीं। आज्ञा देईल सन्मानेंसीं। निजनगरासी जावया॥५७॥

शब्दार्थ: १. सूत कांतणाऱ्या, २. कापूस, ३. अडकविला, ४. कष्टी, ५. कपट.

रावण म्हणे हेचिं बरवे। मान्य केलें माझिया जीवें। परंतु बळीपासीं जावें। जीवें भावें मानेना॥५८॥ मूर्च्छित पडिलों फासा देतां। त्यापासी म्यां मुख दावितां। लज्जा प्राण जाईल ताता। नयें सर्वथा त्यापासीं॥५९॥

वामनाच्या अटी मान्य करून सुटका : युद्धा गेलों अति सत्राणें[1]। त्या मज जालें लाजिरवाणें। येथेंचि आतां प्राण देणें। नाहीं येणें बळीपासीं॥१६०॥ ऋषि म्हणे निषिद्ध राजपवन। येरु म्हणे कैंचें राजलक्षण। सुडका लागला अति दीन। केल्या मुंडन भय काय॥६१॥ जे जे होती बंदिनिर्मुक्त। त्यांसी पाहिजे प्रायश्चित्त। मज आजीच आला सिंहस्थ। निषिद्धार्थ न वदावा॥६२॥ वामनापासून निर्मुक्ती। कदा नव्हे गा कल्पांतीं। माझेनि भाग्यें वपनोक्ती। बोलिला निगुतीं[2] वामन॥६३॥ ऐसें बोलोनि दशवदन। खांडमिशां मस्तकवपन। काळें करोनि वदनचिन्ह। आला आपण अति शीघ्र॥६४॥ देखोनि रावणाचें चिन्ह। लाजविती सकळ जन। गोमयपिंडी[3] अभिषिंचन। दिधला सोडून वामनें॥६५॥ एका जनार्दना शरण। अंगद वक्ता विचक्षण। रावणातें निर्भर्त्सून। वदे आपण निःशंक॥६६॥ पुढील प्रसंगीं रावणकथा। विचित्रवाणी अंगद वक्ता। अपूर्व अप्रमेय अभिनव वार्ता। द्यावें श्रोतां अवधान॥६७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अंगदरावणच्छलनं नाम सप्तमोऽध्यायः॥७॥ ओंव्या॥१७६॥ श्लोक॥७॥ एवं॥१७४॥

## अध्याय आठवा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### अंगद - शिष्टाई वर्णन

रावणाची दुर्दशा : मागिले प्रसंगीं जाण। वामनें गांजिला रावण। तिज्या[4] रावणाचें प्रकरण। सांगे आपण अंगद॥१॥ पूर्वप्रसंगीं स्वभावतां। जाली दों रावणांची कथा। तिज्या रावणाची प्रौढता। ऐक तत्वतां लंकेशा॥२॥ परिसतां अंगदवचन। रावणा हृदयीं खोंचती बाण। कांहीं न चले आंगवण। ऐके आपण कुसमुसित॥३॥

श्वेतद्वीपातील फजिती : एक रावण मूर्खावेशीं। स्वयें निघाला श्वेतद्वपासी। तेथें गति न चले विमानासीं। सेवकांसीं अगम्य॥४॥ मागे सांडोनि विमान। राहवोनियां सेवकजन। एकला निघे रावण। मूर्खाभिमान आक्रोशीं॥५॥ श्वेतद्विपींचें राज्य समस्त। करावया हस्तगत। येणें अभिलाषें लंकानाथ। असे जात श्वेतद्वीपा॥६॥ श्वेतद्वीपासी स्वयें जाण। नारद जाऊं न शके आपण। तेथें बापुडें रावण। मशक कोण प्रवेशे॥७॥ रावण चालतां षण्मास। श्वेतद्वीप न ठाके त्यास। मार्गीं शिणला बहुवस। परम क्लेश पावला॥८॥ न कळे उदय अस्तमान। न मिळे अन्न ना जीवन। नसे बसावया वस्तीचें स्थान। दशानन अति दुःखी॥९॥ पुढें लक्षेना पैं स्पष्ट। मागें यावया भुलला वाट। भ्रमणचक्रीं दशकंठ। परम कष्ट पावला॥१०॥ निरंजनीं विजनवासीं। रावण रडे उकसाबुकसीं। कोण संबोखील त्यासी। परदेशीं एकाकी॥११॥ जळ न्यावया नगराआंत। गंगा प्रवाहे श्वेत। जळवाहका[5] दासींची मात। ऐके निवांत रावण॥१२॥ जळ वाहतां देखोन दासी। रावण जाला अति उल्लासी। मी

शब्दार्थ : १. गर्वाने, नेटाने, २. खरेपणाने, ३. शेणमाराने, ४. तिसऱ्या, ५. पाणी नेणाऱ्या.

पावलों श्वेतद्वीपासी। हरिखें तीपासीं पुसों आला ॥१३॥ देखोनियां दशमुखासी। स्वयें विनोदें धरिती त्यासी। खेळणें करावया दशशिसीं। कौतुकेंसीं आणिला ॥१४॥ दहा मुखें वीस हात। दहाही शिरें मुकुटांकित। अभिनव[1] किडें आलें तेथ। दासी धरित साक्षेपें ॥१५॥ सोडवावया आपणाप्रती। न चले रावणाची शक्ती। जेंवी कां चिडिया[2] पारध्याहांतीं। तैसिया रीतीं धरियेला ॥१६॥ पारध्या हातीं चिडी चिचात[3]। दासीपासीं लंकानाथ। अडकला कुंथत कुंथत। कांहीं सामर्थ्य चालेना ॥१७॥ धरिला देखोन दशानन। भोंवतें मिळाले पैं जन। विनोदें अवघे जण। करिती छळण तें ऐका ॥१८॥ काड्या घालोनियां नासी[4]। विचकाविती दहाही मुखांसी। टोले हाणोनियां शिसीं। डोळे विसी मिचकावी ॥१९॥ एकें हाणोनिया लात। एक हरणुली नाचवित। एक गटांगळया देत। अवघेही दांत विचकावया ॥२०॥ काकस्वरें श्वानस्वरें। खरस्वरें[5] जंबुकस्वरें। भुंकविती पैं लेंकुरें। घुघुस्वरें पैं एक ॥२१॥ एक घालविती कोल्हाटे। एक घालविती हेलाटे। दुःख पावोनि दशकंठें। म्हणे येथें कोठें मी आलों ॥२२॥ अवघ्या मिळोनियां दासी। चेंडू करोनि रावणासी। एक टाकिती एकीपासीं। एकी चौपासीं धांवती ॥२३॥ एकी टाकिती एकीवरी। एकी झेलिती माझारीं। एकी उडविती वरच्यावरी। दुःख दुर्धर रावणा ॥२४॥ जळो ते माझी शौर्यशक्ती। जळो ते माझी प्रताव्यक्ती। जळो ते माझी यश कीर्ती। दासी झेलिती तृणप्राय ॥२५॥ चाकांटली[6] माझी बुद्धी। विध्वंसली माझी शुद्धी। येथें कां आलों मी दुर्बुद्धी। पडिलों बंदी दासींच्या ॥२६॥ दासी परस्परें टाकिती। रावण डसला एकीचें हातीं। चाविरें म्हणोनि निश्चितीं। झुगारिती लंकेसीं ॥२७॥ आदळतां लंकापुरीं। सवोष्ट[7] दातांची चकचुरी। नाक चेंदलें वाहे[8] रुधिरीं[8]। राजद्वारीं आकांत ॥२८॥ ऐसा कोण निधडा दादुला। अंतरिक्षीं संग्राम केला। तेथोनि रावण झुगारिला। तो आदळला लंकेसीं ॥२९॥ इंद्रजितासहित कुमरजन। वृत्तांत पुसती प्रधान। रावण झाला लज्जायमान। प्रतिवचन नेदीच ॥३०॥ तिज्या रावणाची ख्याती। श्वेतद्वीपगमनानुवृत्ती। सांगितली सर्वही तुजप्रती। यथानिगुतीं लंकेशा ॥३१॥

**वालीच्या तावडीत : चौथ्या रावणाची स्थिती।** अतिशयें अभिनव कीर्ती। ते मी सांगेन तुजप्रती। लंकापते अवधारीं ॥३२॥ चवथा रावण आतुर्बळी। ध्यानस्थ देखोनियां वाळी। त्यासी धरितां कपटमेळीं। तेणें काखेतळीं दडपिला ॥३३॥ रावण घालोनि काखेतळीं। सवेग उडोनियां वाळी। सप्तसमुद्रीं करोनि आंघोळी। ध्यानानुमेळीं बैसला ॥३४॥ रावणा दृढ लागली कळ। चरफडी परी न चले बळ। नाकीं तोंडीं भरलें कक्षाजळ[9]। जाला विकळ ते काळीं ॥३५॥ निजभवना येतां वाळी। अंगद उचलितां सुखसमेळीं। काखेचा रावण पडिला तळीं। वानरीं सकळीं देखिला ॥३६॥ वीस भुजा दश शिर। मुकुट कुंडलें मनोहर। कंठीं विविध विचित्र हार। अति सुंदर अंगदीप्ति ॥३७॥ पाचू पदक हृदयावरी। मुक्ता[10]फळांच्या झालरी। कटिसूत्र कटीवरी। झळकत हारी[11] क्षुद्रघंटा[12] ॥३८॥ ऐसा देखतां वानरीं। अंगदाच्या पाळण्यावरी। रावण बांधिला खेळण्यावारी। हेमसूत्री शृंखळा ॥३९॥ बाळलीलापदसंचारी। लाथा हाणी मुखावरी। अंगदमूत्राची धार थोरी। रिघे मुखांतरीं रावणाच्या ॥ ४०॥ चिमटितां वानरवानरीं। दांत विचकी नानाविकारीं। टोले देतां शिरावरी। डोळे त्यांवरी मिचकावी ॥४१॥ लाता हाणितां संमुखा। क्षतें पडलीं दहाही मुखां। अंगद पारखी निका। तेणें दशमुखा ओळखिलें ॥४२॥ अंगद म्हणे त्यातील तूं कोण। हें पुसावें न

---

**शब्दार्थ :** १.विलक्षण, २. चिमण्या, ३. चिवचिव करते, ४. नाकात, ५. गर्दभस्वर काढून, ६. मोह पावली, ७. ओठासकट, ८. रक्त वाहू लागले. ९. काखेतील घाम, १०. मोत्यांच्या, ११. रांगेने, १२. बारीक घागऱ्या.

लगे जाण। माझे लातांचे वण। तुझे मुखीं संपूर्ण दिसती।।४३।। माझ्या मुताची बाळधार। तुझे मुखी पडतां निरंतर। तेही चिन्हें उभय अधर। घांसली कोर दिसतसे।।४४।। तो तूं अतिशयें हीन दीन। भद्रीं[1] बैसलासि रावण। तुज कैंची आंगवण। करावया रण रामासीं।।४५।।

त्याचा रावणावर परिणाम. त्याची धमकी : अंगदाचे वाग्बाण। हृदयीं खोंचले संपूर्ण। तेणें तळमळी रावण। वचनें प्राण जाऊं पाहे।।४६।। अंगदवाक्य खडतर। शतधा खोंचलें जिव्हार। तेणें तळमळी दशशिर। सर्वथा वानर नाटोपे।।४७।। अंगद नाटोपे वचनानुमेळीं। अंगद नाटोपें करितां कळी[2]। अंगद बैसला आतुर्बळी। रावण चळीं कांपत।।४८।। अंगदासीं करावया रण। स्वयें साशंकित दशानन। कुमर कांपती प्रधान। कंपायमान राक्षस।।४९।। हनुमंते लाविला धाक। त्याहूनि अंगद निःशंक। तेणें धाके एकएक। सैन्य सेवक सेनानी।।५०।। ऐसें देखोनियां चिन्ह। बुद्धिवंत दशानन। अति कोपें हास्यवदन। काय आपण अनुवादे।।५१।। सभेसीं बैसोनि वानरा। किती जल्पसी[3] सैरावैरा। तोंडी नाहीं वोढावारा[4]। दशशिरा नोळखसी।।५२।। ऐक माझी आंगवण। वंदीं घातले सुरगण। श्रीराम बापुडें तें कोण। संमुख रण करावया।।५३।। माझी वाजतांचि हाक। सुरासुरीं अति धाक। श्रीराम बापुडें मशक। मजसंमुख केंवी राहे।।५४।।

इंद्रं माल्यकरं सहस्रकिरणं द्वारे प्रतिहारकं। चंद्रं छत्रधरं संमीरवरुणौ संमार्जयंतौ गृहान्।
पाच्यत्वे परिनिष्ठितं हुतवहं किं मद्गृहे नेक्षसे रक्षोभक्ष्यमनुष्यमात्रवपुषं त्वं राघवं स्तौषि किम्।।

रावणाची अवास्तव आत्मस्तुती : रणीं करोनियां दुर्धर मार। बंदीं घातले सुरवर। कामार[5] केले समग्र। तोही प्रकार अवधारीं।।५५।। पाचारोनि कुसमाकर[6]। विचित्र शेजा विचित्र हार। इंद्रें आणावे सत्वर। माल्यधर तो केला।।५६।। सूर्य जो कां सहस्रकर[7]। द्वारपाळ निरंतर। मलयानिळ[8] चवरधर। चंद्रें छत्र धरावें।।५७।। वायूचा अधिकार जाण। बिदी झाडाव्या संपूर्ण। वरुण येवोनि आपण। सडासंमार्जन करावें।।५८।। स्वयें न लावितां इंधन। फुंकिते रांधिते नसोन। अग्नि निपजवी अन्न पक्वान्न। सूपविधान शास्त्रार्थें।।५९।। जाहलिया पाकविधान। स्वयें अग्नीनें आपण। करावें वस्त्रक्षाळण। रंग राखोन सावध।।६०।। सबळ डाग बैसले पोटीं। ते काढावे उठाउठीं। जावों न द्यावी का नवटी[9]। मळमळवटीं फेडावीं।।६१।। जळावांचून सकळ मळ। सबाह्य करावे निर्मळ। ऐसा क्षाळक कुशळ। अधिकारी प्रबळ नेमाचा।।६२।। विधि दळकांड करी। चंडी तराळी[10] माझे नगरीं। माझ्या सामर्थ्याची थोरी। घरोघरीं पाहें पां।।६३।। बृहस्पति माझे कीर्तीचा भाट। ब्रह्मा नित्य जपे शांतिपाठ। माझ्या सामर्थ्याचा लोट। अति वरिष्ठ तिहीं लोकीं।।६४।। राम बापुडें मानवी नर। आमुचें खाजुकें ग्रासमात्र। वानर जे कां पालेखाईर। धाकेंचि समग्र निमतील।।६५।। मुख्य भक्ष्य राम लक्ष्मण। वानर तिखटें कोशिंबिरी जाण। एकेंचि घांसें कुंभकर्ण। भक्षील आपण निमेषार्धें।।६६।। शंभुसमवेत गौरी। म्यां आंदोळिला कैलासगिरी। त्या मज रावणाची थोरी। चराचरीं अतुळित।।६७।। तो मी ऐकतां दशानन। मानवी श्रीरामाचें स्तवन। अंगदा वल्गसी गर्जोन। आनेंआन सैराचि।।६८।। श्रीरामें कोंठे केलें रण। कोणे दमिला वीर दारुण। मारिले त्रिशिरा खर दूषण। हेचि उचकण[11] मज देशी।।६९।। ऐसें बोलतां दशानन। अंगद वक्ता अति सज्ञान। श्रीरामाचे गुण गर्जोन। वदे संपूर्ण पुरुषार्थ।।७०।।

शब्दार्थ : १. सिंहासनावर, २. भांडण, तंटा, ३. बडबडतोस, ४. प्रतिबंध मर्यादा. ५. चाकर, ६. वसंत, ७. सहस्र हस्तांचा (किरणांचा), ८. मलयपर्वतावरील वारा. ९. नवीनता, १०. चाकर, ११. स्मरण.

अंगदाकडून रावणाचा धिक्कार : धिग् धिग् रावणा तुझी कथा। संमुख न येववेचि रघुनाथा। चोरून पळालासी सीता। वृथा पुरुषार्था जल्पसी॥७१॥ जेणें तुज बैसवूनि कांखेतळीं। केली सप्तसमुद्रीं आंघोळी। तो श्रीरामें मारोनि वाळी। तुज सहकुळीं वधूं आला॥७२॥ जय्रा विराधाभेण। सर्वदा पळे रावण। तो श्रीरामें मारोनि जाण। राक्षसकंदन करूं आला॥७३॥ स्वयंवरीं नुचलेचि कोदंड[1]। तें श्रीरामें केलें दुखंड। तयाहीपुढें बळबंड। वृथा तूं लंड वल्गसी॥७४॥ ज्यासी समुद्र आला शरण। जेणें समुद्री तारिले पाषाण। त्या श्रीरामा माणुसपण। मूर्ख रावण तूं म्हणसी॥७५॥

> रे रे रावण हीन दीन कुमते रामोऽपि किं मानुषः
> किं गंगापि नदी गजः सुरगजो उच्चैश्रवाः किं हयः।
> किं रंभाप्यबला कृतं किमु युगं कामोपि धन्वी नु किं
> त्रैलोक्यप्रभवप्रतापविभवः किं रे हनूमान्कपिः॥१॥

रामाचे महत्त्व न कळल्याबद्दल रावणाचा धिक्कार : ऐकें रावणा कुमती। दुष्टबुद्धि तूं दुर्मती। चैतन्यविग्रही[2] श्रीराममूर्ती। मनुष्य त्याप्रतीं तूं म्हणसी॥७६॥ रामनामें मनुष्य तरती। मनुष्य मानिसी त्या रघुपती। रावण तुज अति दुर्मती। द्वेषानुवृत्तीं मरसील॥७७॥ इतर ओहळांसमान। मानूं नये गंगाजीवन। जिचे जळीं करितां स्नान। परम पावन जड जीव॥७८॥ समुद्रमंथनींचा ऐरावती। मानूं नये रानवट हस्ती। उच्चैःश्रवा अश्वजाती। पशु अश्वस्थिती मानू नये॥७९॥ कर्पूर कर्दळीजन्मस्थान। रंभा युवती स्वर्गभूषण। ते जड मूढ स्त्रियांसमान। सर्वथा जाण नव्हे॥८०॥ कृतयुगाचें महिमान। सत्यवादी सात्विक जन। इतर युगेंसीं संमान। तें युग जाण नये मानूं॥८१॥ अंगीं नुमटतां वण। स्त्रीपुरुषां भेदी पंचबाण[3]। तो स्थूळ धनुर्धरांसमान। सर्वथा जाण नये मानूं॥८२॥ समुद्राचें उल्लंघन। राक्षसकंदन लंकादहन। ऐसा हनुमंताचा प्रताप पूर्ण। त्रैलोक्यीं जाण स्वयें वंद्य॥८३॥ ऐसा हनुमंत कपींद्र। ज्यासीं आत्मत्वें मानी श्रीरामचंद्र। त्यासी तूं म्हणसी वानर। तूं दशशिर महामूर्ख॥८४॥ गंगा नव्हे नदीपडिपाडें। ऐरावता हस्तित्व न घडे। उच्चैःश्रवा नव्हे घोडें। कृतयुगा न घडे इतर युगत्व॥८५॥ रंभा नव्हे इतर नारी। हनुमान नव्हे तनुवानरी। राम परब्रह्म अवतारी। मनुष्यदेहधारी तो नव्हे॥८६॥ राम नव्हे मानुषवेख। राम त्रैलोक्यीं तारक। राम परमात्मा चोख। राम निष्टंक[4] परब्रह्म॥८७॥ मरमर रे लंकानाथा। मनुष्य मानिसी रघुनाथा। बळें कुंथतोसि आतां। तुझे बळ वृथा तें ऐक॥८८॥ शंभूसहित स्वयें गौरी। आंदोळिला कैलासगिरी। म्हणसी त्या बळाची थोरी। तृणावारी सरेना॥८९॥

> रे रे रावण शंभुशैलमथने प्रख्यातवीर्यं
> कथं रामेण प्रतियोद्धुमिच्छसि मुधा चेत्तत्र युक्तं तव।
> रामस्तिष्ठतु लक्ष्मणेन धनुषा रेखा कृताऽलंघिता
> तच्चारेण च लंघितो जलनिधिर्दग्धा हतोक्षः पुरी॥३॥

रावणाची अंगदाकडून निर्भर्त्सना : कैलास आंदोळणाचें बळ। सीता चोरितांचि तत्काळ। तुझें तुज जालें निर्फळ। तूं निर्बळ नपुंसक॥९०॥ म्हणसी श्रीरामीं करीन युद्ध। अयुक्त वचन बोल अबद्ध। श्रीरामाभेणें पळसी निर्बंध। त्यासीं युद्धा तें केवीं मिळसी॥९१॥ तुज नाहीं आंगवण। श्रीरामासीं न करावे रण। लक्ष्मणरेखेपुढें जाण। काळें वदन तुझें जालें॥९२॥ लक्ष्मणाची धनुष्यरेखा। नुल्लंघवेचि दशमुखा। तूं सदाचि काळमुखा। वृथा आवाकां[5]

शब्दार्थ : १. शिवधनुष्य, २. ज्ञानरूपी विग्रह =देह धारण करणारा, ३. मदन, ४. पूर्णपणे, ५. बलाढ्यता.

बळदर्प ॥९३॥ तुज नुल्लंघवे धनुष्यरेखा। श्रीरामसेवकाचा आवांका। समुद्र लंघोनियां देखा। येवोनि लंका विध्वंसी ॥९४॥ वनकर किंकर प्रधान पुत्र। जंबुमाळी अखया कुमर। मारोनियां निशाचर। लंकापुर जाळिलें ॥९५॥ तुम्हांमाजी इंद्रजित अदट[1]। त्याचें हनुम्यानें काढिलें चरपट। पळावया पुढे न फुटे वाट। विवरीं स्पष्ट लपाला ॥९६॥ श्रीरामाचा निजसेवक। हनुमान एकला एक। तेणें मर्दूनि तुझें कटक। तुझें दशमुख जाळिलें ॥९७॥ हनुम्यानें जाळिलें तुझ्या तोंडा। सभेसीं बैसलासी काळतोंडा। वृथा बोलसी बळवंडा। ऐक लंडा निजहित ॥९८॥ सीता अर्पूनि आपण। श्रीरामासीं रिघाल्या शरण। तैंच तुझे वांचती प्राण। येरवीं मरण कुळेंसीं ॥९९॥ श्रीरामा सीता न देतां जाण। रावणा तुज राखेल कोण। मीच तुझा घेईन प्राण। आंगवण पाहें माझीं ॥१००॥

अंगदाचा आविष्कार आणि रावणाची तारांबळ : रावणा तुझीं दहाही शिरें। मी छेदितों नखाग्रें। परी तीं शिवनिर्माल्य अपवित्रें। म्हणोनि करें[2] ना स्पर्शें ॥१॥ शिरें वाहून विश्वनाथा। परतोनि वाहिलीं माथां। पूर्ण पापी तूं लंकानाथा। तुज मारितां दोष नाहीं ॥२॥ स्मरोनियां श्रीरघुनाथा। पाप न बाधी तुज मारितां। दहाहि शिरीं हाणोनि लाता। रणीं आतां पाडीन ॥३॥ दशमुखासंमुख। अंगद आला निःशंक। रावणा तूं रंक मशक। मारितां देख कोण राखे ॥४॥ अतिशयेंसिं निगरघट[3]। अंगीं आदळला मर्कट। तेणें बजबजिला दशकंठ। करील शेवट वानर ॥५॥

ततः सरोषमापन्नः शशास सचिवांस्तदा । गृह्यतामिति दुर्मेधा वध्यतामिति चासकृत् ॥४॥
रावणस्य वचः श्रुत्वा दीप्ताग्निमिव तेजसा । आललंबुस्ततो घोराश्चत्वारो रजनीचराः ॥५॥
ग्राहयामास तारेयः स्वयमात्मानमात्मवान् । बलं दर्शयितुं वीरो निशाचरगणे तदा ॥६॥
स तान्बाहुद्वयासक्तानादाय पतगानिव ॥७॥

अंगदाच्या माराने रावण गडबडला : अंगद आदळला अंगासीं। बोलिला निष्ठुर वाक्यासी। तेणें रावण कासाविसी। अति कोपेंसीं कोपला ॥६॥ रावणासीं विविध बाध। स्वयेंचि भय स्वयेंचि क्रोध। धरा म्हणावया अंगद। सहसा शब्द न बोलवे ॥७॥ वांचवावया आपणासी। आक्रोशें सांगे प्रधानांसी। धरा मारा रे वानरासी। मज सभेसीं निर्भर्त्सी ॥८॥ न धरितां भीडचाड। सभेमध्यें हा माकड। माझें म्हणे काळें तोंड। खंडविखंड करा यासीं ॥९॥ माझे अपवाद असंख्यांत। हा बोलिला सभेआंत। अवश्य याचा करावा घात। तुम्हीं समस्त मिळोनी ॥११०॥

अंगदाला पकडण्याचा सेनानींचा प्रयत्न : ऐकोनि रावणाचें वचन। अंगद धरावया जाण। सैन्य सेनानी प्रधान। अति गर्जोन धांवती ॥११॥ अंगद विचारी मानसीं। मारूं नये रावणासीं। अलोट रावणाच्या बळासीं। आणि सैन्यासी शक्ति किती ॥१२॥ यालागीं अंगदें आपण। थोडेंचि केलें उड्डाण। त्यासी धरावया सकळ सैन्य। अति सत्राण[4] धाविन्नलें ॥१३॥ गदा मुद्गल परिघ पाषाण। शिळा शिखरें विंधिती बाण। अंगदासी धरावया पूर्ण। रक्षोगण[5] धाविन्नले ॥१४॥ धरीं मारीं पाडीं पाडीं। करीत आले राक्षसकोडी। अंगदा न बाधी भयसांकडी। लव वांकडी नव्हेचि ॥१५॥ लांब सोडिली पुसाटी[6]। तेथें झोंबल्या राक्षसकोटी। एक झोंबलें चरणासन्निष्ठीं[7]। एकीं तो कंठीं कवळिला ॥१६॥ पक्षी उडोनि आकाशीं। झडपोनि धरिती वृक्षासी। तेंवी चौघे वीर पक्षाभिवेषीं। अंगदासीं झोंबले ॥१७॥ चौघांही वीरां बळ बहू। अंगद धरिला दोहीं बाहू। रामस्मरणें निःसंदेहू। नाहीं संदेहू अंगदा ॥१८॥ जेंवी कां गुळावरी माशी। तेंवी अंगद राक्षसीं। वेढिला तो चौपासीं। तरी अंगदासीं नाहीं शंका ॥१९॥

शब्दार्थ : १. मोठा वीर, २. हाताने, ३. बळवान्, ४. आवेशाने, ५. राक्षससमुदाय, ६ पुच्छ, ७. पायाला.

प्रासादं शैलसंकाशमुत्पपातांगदस्तदा। तेंऽतरिक्षाद्विनिर्धूतास्तस्य वेगेन राक्षसाः॥८॥
भूमौ निपातिताः सर्वे राक्षसेंद्रस्य पश्यतः। भंक्त्वा प्रासादशिखरं नाम विश्राव्य चात्मनः॥९॥
आस्फोटयामास तदा विनद्यं चक्रमे पुनः। वायुवेगं समालंब्य रावणस्य तदांगदः॥१०॥
जग्राह मुकुटं चीरं पादप्रास्थाय मस्तके। अंगदेन पदाक्रांतो रक्षः संसदि रावणः॥११॥
रावणस्तु परं चक्रे क्रोधं प्रासादघर्षणात्। विनाशं चात्मनो पश्यन्निःश्वासपरमोऽभवत्॥१२॥

**अंगदाच्या पराक्रमाचे वर्णन :** कटिपुष्ठीं बाहुमूळीं। अंगद धरिला राक्षसीं सकळीं। तेणेंसी तो आतुर्बळी। स्वयें तत्काळीं उडाला॥१२०॥ लंकेसीं शिखरासमान। रावणाचे निजभवन। अंगदाचें निजउड्डाण। सवेग जाण तेथें आलें॥२१॥ तेथोनिया पाहतां तळीं। भूमिका दिसताहे जवळी। म्हणोनि अंगद बळिया बळी। वेगें निराळीं[1] उडाला॥२२॥ अंग झाडितां आतुर्बळी। राक्षसीं धरिला होता बळीं। अंगक्तें पडोनि तळीं। जाली रांगोळी अवघ्यांची॥२३॥ पाणी न मागतां देख। निमाले एक एक। महावीरीं घेतला धाक। त्यासंमुख न ये कोणी॥२४॥ तेथोनि अंगदाचें उड्डाण। सवेग येतांचि सत्राण[2]। तळीं पाडोनि रावण। मस्तकीं चरण दिधला॥२५॥ अंगदें हाणितांचि लाथा। रावण पडिला पालथा। त्यासी होतां पैं उलथा। बळ सर्वथा राहेना॥२६॥ रावण घालोनि पायांतळीं। अंगद गर्जे महाबळी। धुर सोडवावया ये काळीं। राक्षस कुळीं कोण आहे॥२७॥ इंद्रजित अथवा कुंभकर्ण। सैन्य सेनानी प्रधान। सोडवावया स्वयें रावण। आंगवण नव्हें कोणा॥२८॥ कुंभकर्ण निद्राग्रस्त। वानरभयें इंद्रजित। स्वयें चळचळां कांपत। भयें आकांत प्रधानां॥२९॥

**अंगदाचे राक्षसांना आव्हान :** राक्षसांचे सभेआंत। लिडाविला[3] लंकानाथ। अंगद अतिशयें गर्जत। नव्हें पुरुषार्थ राक्षसां॥१३०॥ नामविख्यात वाळिसुत। अरे मी अंगद श्रीरामदूत। दमावया राक्षसपुरुषार्थ। लंकेआंत आलों असें॥३१॥ कोणा अंगीं असेल बळ। कोणी करूं शकेल सळ। तेणें येवोनि तत्काळ। रणकल्लोळ करावा॥३२॥ माझ्या पायांतळीं दशानन। अडकलासे संपूर्ण। ज्यासी असेल आंगवण[4]। तेणें सोडवण करूं यावें॥३३॥ घेतला राक्षसीं सभामंडपीं अति आवेशीं। अंगद पाचारी युद्धासीं। कोणी न ये सोडवणेसी। अति त्रास॥३४॥ विध्वंसावें लंकाभुवन। तें शरणागता दिधलें दान। तेणें क्षोभेल रघुनंदन। ऐसें आपण नये करूं॥३५॥ दान दिधलें शरणागता। ते म्यां लंका मोडितां। क्षोभ वाटेल रघुनाथा। यालागीं स्वस्थता राखिली॥३६॥ स्वयें मारूं नये रावण। अंगदें जाणोनि आपण। मुकुट हिरोन घेतला॥३७॥ मुकुट घेवोनि आपण। अंगद उडतां पायीं दडपोन दशानन। मस्तकें मंडप उचलिला पूर्ण। नाहीं ज्ञान अंगदा॥३८॥ धन्य अंगदाचा साटोप[5]। सत्राण। ऐशींसहस्रस्तंभी मंडप। उपडितां न कळेचि अल्प। परम प्रताप कपीचा॥३९॥ ख्याति करोनि उद्भट[6]। शिरीं मंडप हातीं मुकुट। अंगद आला वीरवरिष्ठ। देखिला स्पष्ट वानरीं॥१४०॥ मागें लंकेमाजी जाण। कळकळिती राक्षसगण। नेलें सभेचें मंडण। भाग्यें रावण वांचला॥४१॥ अंगद वीर उद्भट। रावणा घोळसोनि स्पष्ट। हिरोनि घेतला मुकुट। भाग्यें दशकंठ वांचला॥४२॥ अंगदापासून रावणें। भाग्यें सुटल्या जीवें प्राणें। आजि करा याचें जिताणें[7]। वर्धापन जीविताचें॥४३॥ रावण सांगे स्वभावतां। अंगदें हाणितांचि लाथा। प्राण जावा पैं तत्वतां। सभाग्यतां वांचलों॥४४॥ म्हणों पुरुषार्थी हनुमंत। त्याहून अंगद विख्यात। देखोनि वानराचा पुरुषार्थ। साशंकित रावण॥४५॥ मंडप अंगदाचे शिरीं। रत्नकळसांचियां हारी। मुक्ताफळांच्या झल्ररी। पताका वरी विचित्र॥४६॥ वानर सांगती

शब्दार्थ : १. आकाशांत, २. वेगाने, ३. घोळसाविला, ४. सामर्थ्य, ५.पराक्रम, ६. मोठी, ७. जिवंत सुटल्याबद्दल उत्सव.

उल्हासतां। सगळी लंका घेवोनि माथां। अंगद आला ऊर्ध्वपंथा[1]। पाहें पुरुषार्था श्रीरामा।।४७।।

अंगदाच्या कृतीने रामास क्रोध. अंगद मंडप पुनर्स्थापित करतो : मंडप देखोनियां माथां। कोप आला श्रीरघुनाथा। अंगदें केली अधर्मता[2]। तुझ्या घाता मी करीन।।४८।। लंका दिधली शरणागता। तेथींचा अर्थ येणें आणितां। मज लागेल अधमता। तुज या अर्था दंडीन।।४९।। अंगद म्हणे ऐकें रघुनाथा। निजबळें मज उडतां। केव्हा मंडप बैसला माथां। नकळतां मज येथें आला।।१५०।। मस्तकबळें उपडोन। मंडपाचें येथें आगमन। सर्वथा मज नाहीं ज्ञान। तुझी आण श्रीरामा।।५१।। ऐकोनि अंगदाची आण। श्रीराम झाला सुप्रसन्न। अंगदें करोनि रामस्मरण। केलें विंदान तें ऐका।।५२।। पुढील येतें जें उड्डाण। तें करोनि उलटें किराण[3]। लक्षोनियां सभास्थान। मंडप संपूर्ण सांडिला।।५३।। बाप[4] अंगद विंदानी। उथाळीं बैसलीं स्तंभस्थानीं। समूळ सूत्र चुकों नेदूनी। ठेविला स्वस्थानीं मंडप।।५४।। मंडप येतां कडकडाट। राक्षसां होय हृदयस्फोट। आक्रंदला दशकंठ। आलें अरिष्ट अनिवार।।५५।। अंगद मंडप गेला घेवोनी। श्रीरामें सोडविला परतोनी। रावणें ऐकतांचि कानीं। धाकें मनीं भयभीत।।५६।। अंगद म्हणे दशानना। रामें मंडप धाडिला जाणा। लंका दिधली बिभीषणा। रणीं रावणा मारूनी।।५७।। ऐसें सांगोनि लंकानाथा। अंगद परतला तत्वतां। भेटावया श्रीरघुनाथा। उल्हासता स्वानंदें।।५८।।

अंगदः पुनरागत्य ववंदे चरणौ ततः। सुग्रीवस्य च रामस्य लक्ष्मणस्य तथैव च।।१३।।
अन्योन्यं ते महावीरा अभिवाद्य महाबलाः। रक्षोराजस्य मुकुटं राघवाय न्यवेदयत्।।१४।।
तं दृष्ट्वा मुकुटं रामो रत्नसारविभूषितम्। आबबंध महाबाहू रावणानुजमस्तके।।१५।।

अंगदाचे रावणाच्या मुकुटासह पुनरागमन : लंकेसीं मंडप सांडून। अंगदें करोनियां उड्डाण। सवेग येवोनि आपण। श्रीरामचरण वंदिले।।५९।। वंदोनि सौमित्र चरण। सुग्रीवासी अभिवंदन[5]। वंदोनिया बिभीषण। लोटांगण हनुमंता।।१६०।। आणिकही वानरवीर। नळनीळजांबुवंतादि थोर। अवघे वंदोनि वानर। केला भुभुःकार रामनामें।।६१।। सवेंचि[6] अंगद महावीर। येवोनि श्रीरामा समोर। पुरुषार्थाचें निजसार। केलें चरित्र तें दावी।।६२।। अनर्घ्य[7] रत्न अति तेजिष्ठ। रावणाचा महामुकुट। श्रीरामापुढें ठेवोनि स्पष्ट। पायां मर्कट लागला।।६३।। तुझिया कृपा श्रीरघुनाथा। लंकेसीं जावोनि तत्वतां। रावणापासीं सांगतां सीता। अति अहंतां[8] अनुवादे[9]।।६४।। तेथें म्यां केल्या तीव्र गोष्टी। जेणें रावण कपाळ पिटी। तरी तो राक्षस महाहट्टी। सीता गोरटी सोडीना।।६५।। तुम्हांसी मागता कोरान्न। मी तंव सीता नेदीं चिद्रत्न। ऐसें बोलतां दशानन। कोप दारुण मज आला।।६६।। रावण ऐसा अति बळिष्ठ। घायें ढिलाविला सुभट[10]। पायें चेपून दशकंठ। शिरींचा मुकुट हरियेला।।६७।। राक्षसांच्या वीरश्रेणी। धाविन्नल्या माझ्या ग्रहणीं[11]। त्या म्यां आपटितां अवनीं। रुधिरें धरणीं[12] प्रवाहे।।६८।। रावण गांजिलियापाठीं। राक्षस निघाले दिग्पटीं। तिहीं सांडिल्या युद्धगोष्टी। संमुख दृष्टी कोणी नये।।६९।। तेथूनि मज सवेग येतां। मंडप आला न कळतां। तो म्यां सांडिला मागुता। सत्य रघुनाथा हे गोष्टी।।१७०।। ऐकोनि अंगदाच्या गोष्टी। मुकुट देखोनियां दृष्टीं। श्रीराम सुखावला पोटीं। स्वानंदपुष्टीं आलिंगी।।७१।।

आनंदशौर्याचा गौरव : धन्य अंगदाचा पुरुषार्थ। रणीं गांजोनि लंकानाथ। मुकुट घेवोनि

शब्दार्थ : १. आकाशमार्गाने, २. अन्याय, ३. उड्डाण, ४. मोठा, ५. नमस्कार करून, ६. लगेच, ७. अमूल्य, ८. मोठ्या गर्वाने, ९. बोलतो, १०. अत्यंत, ११. पकडण्याकरिता, १२. पृथ्वीवर.

आला व्यक्त। अति विस्मित श्रीराम ॥७२॥ संतोषोनि रघुनंदन। हृदयीं आलिंगी सुप्रसन्न। करी अंगदमुखचुंबन। अंगद धन्य श्रीरामें ॥७३॥ श्रीरामें मुकुट घेवोन। पाचारोनि बिभीषण। त्याचे मस्तकीं आपण। संतोषोन स्वयें घाली ॥७४॥ बिभीषण जाला राज्यधर। वानरीं केला जयजयकार। रामनामें गर्जे अंबर। देती भुभुःकार स्वानंदें ॥७५॥ मुकुट बिभीषणाचे मौळीं[1]। देखोनि वानरीं सकळीं। हरिखें पिटोनियां टाळी। सुखकल्लोळीं नाचती ॥७६॥ नळ नीळ जांबुवंत। सुग्रीव सुषेण हनुमंत। अंगदाचा पुरुषार्थ। वानर वानीत[2] आल्हादें ॥७७॥ अंगद वीर अति उद्भट। अंगद वीर भट सुभट। तेणें गाजोनि दशकंठ। आणिला मुकुट प्रत्यक्ष ॥७८॥ ऐसी अंगदाची वाटिव[3]। वानर वानिताती सर्व। अंगदमानसीं श्रीराघव। भाग्यें अभिनव अंगद ॥७९॥ शिष्टायी न मानीच रावण। तेणें क्षोभला रघुनंदन। आतां करील रणकंदन। दुर्धर बाण सोडूनी ॥१८०॥ वानर निशाचर रणीं। भिडती झोंटधरणीं। अशुद्धें[4] पूर वाहेल धरणीं। आयणीपायणी[5] भिडतील ॥८१॥ एका जनार्दना शरण। अंगदशिष्टाई जाली पूर्ण। पुढें गोड निरूपण। रम्य रामायण श्रीरामें ॥१८२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडें एकाकारटीकायां अंगदशिष्टाईनिरूपणं नाम अष्टमोऽध्यायः ॥८॥ ओंव्या ॥१८२॥ श्लोक ॥१५॥ एवं ॥१९७॥

## अध्याय नववा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### द्वंद्वयुद्ध वर्णन

**बिभीषणाला अंगदाने आणलेल्या मुकुटाचे अर्पण :** सभेंत गांजूनि रावणातें। अंगदे आणिल्या मुकुटातें। श्रीरामें आपुल्या निजहातें। बिभीषणातें वाहिला ॥१॥ मुकुट बाणतां बिभीषणासीं। देखोनि उल्लास वानरांसी। राजशोभा शोभली त्यासीं। श्रीरामासीं आल्हाद ॥२॥

ददृशुर्वानरा वीरा भीषणं च बिभीषणम् । मुकुटेन प्रभासंतं त्रिकूटमिव मंदरम् ॥१॥
रामस्तु बहुभिर्हृष्टैर्विनदद्भिः प्लवंगमैः। वृतो रिपुवधाकांक्षी युद्धायैव प्रवर्तत ॥२॥

मुकुट बाणतां बिभीषणासीं। कैसी शोभा आली त्यासी। जेंवी मंदराद्रि[6] रत्नशिखरेंसीं। शोभा तैसी बिभीषणा ॥३॥ मस्तकीं बाणतांचि मुकुट। जैसा जाला राज्यपट। तैसा दिसताहे तेजिष्ठ। अति वरिष्ठ बिभीषण ॥४॥ बिभीषणआज्ञेचें भय भारी। जेंवी राजमुद्रा बाणली शिरीं। ऐसा देखोनि वानरीं। नवलपरी तिहीं केली ॥५॥ मिळोनियां वानरवीरीं। रामाज्ञा वंदूनि शिरीं। छत्र धरोनि बिभीषणावरी। जयजयकारीं गर्जती ॥६॥ नवछत्र रावणावरी। झडपून आणिलें वानरीं। धरोनि बिभीषणावरी। जयजयकारीं गर्जती ॥७॥ बिभीषण देखोनि छत्रांकित[7]। अति उल्लासें उल्लासित। स्वयें जाला श्रीरघुनाथ। नामें गर्जत वानर ॥८॥ सत्यसंकल्प श्रीरघुनाथ। बिभीषण जाला राज्यप्राप्त। वानर आल्हादें नाचत। स्वयें गर्जत हरिनामें ॥९॥

**बिभीषणाचा छत्र स्वीकारण्यास नकार :** छत्र नसतां रघुनाथा। मज धरूं नये सर्वथा। स्वामिमर्यादा संरक्षिता। अति ज्ञाता बिभीषण ॥१०॥ छत्र ठोवोनियां दुरी। गदा घेवोनियां

शब्दार्थ : १. मस्तकावर, २. वर्णन करू लागले, ३. शौर्य, ४. रक्ताने, ५. क्रमाक्रमाने, ६. मंदर पर्वत, ७. राजचिन्ह अशा छत्राने मंडित.

करीं। मिळोनि सुग्रीवामाझारीं। नमस्कारीं श्रीरामा ॥११॥ बिभीषण निजव्युत्पत्ती। अंगदाची शौर्यशक्ती। अंगदाची अगाध ख्याती। अनुवादे कीर्ति आल्हादें॥१२॥ ज्याचे बंदीं सुरगण। तोही आक्रमून रावण। चरणीं दशकंठ मर्दून। मुकुट हिरोन आणिला॥१३॥ ऐसी करावया ख्याती। त्रिलोकीं कोणा नाहीं शक्ती। अंगदाची अगाध कीर्ती। सुर वानिती स्वर्गस्थ॥१४॥ अंगदाची वीरवाढिव[1]। वानर करिताती भाटिव[2]। गुण अनुवादे श्रीराघव। भाग्यवैभव अंगदा॥१५॥ शिष्टाई न मानीच रावण। तेणें क्षोभला रघुनंदन। करावया रिपुदलन[3]। रणगर्जनें चालिला॥१६॥

उत्तरं द्वारमागत्य रामः सौमित्रिणा सह । आवृत्य बलवांस्तस्थौ सुग्रीवश्च महाबलः॥३॥
गजो गवाक्षो गवयः शरभो गंधमादनः। भीमो दधिमुखश्चैव केसरी पनसस्तथा॥४॥
एतस्मिन्नंतरे चक्रुः स्कंधावारनिवेशनम्॥५॥

रामचंद्रांचे सुग्रीवासह लंकेच्या उत्तर द्वाराजवळ आगमन : लंकाउत्तरद्वाराजवळीं। राम आला महाबळी। सौमित्रही आला तत्काळीं। शस्त्रसमेळीं सन्नद्ध॥१७॥ गेला देखोनि रघुनाथ। सुग्रीव जो कां वानरनाथ। कपिसमुदायासमवेत। आला तेथ अति शीघ्र॥१८॥ सन्नद्ध बद्ध गदापाणी। बिभीषण आला तत्क्षणीं। भिडावया रणांगणीं। रामाज्ञेलागूनी तिष्ठत॥१९॥ गेला देखोनि रघुनाथ। नळ नीळ जांबवंत। अंगदादि हनुमंत। वानर समस्त स्वयें आले॥२०॥ आपुलाल्या निजकोटीं। वानरवीर जगजेठीं। राहिले पैं नेहटानेहटीं। युद्धसन्निर्षीं[4] सन्नद्ध॥२१॥ गज गवाक्ष गवय जाण। शरभ ऋषभ गंधमादन। भीम दधिमुख सुषेण। केसरी दारुण रणयोद्धा॥२२॥ वीर वानर जो कां पनस। युद्धालागीं अति कर्कश। करावया राक्षसांचा नाश। अति उल्हास युद्धाचा॥२३॥ हे अकराही वीर जाण। युद्धार्थीं अति दारुण। तिहीं केलें जें विंदान। करावया रण तें ऐका॥२४॥

राक्षसांवर हल्ला : लंकादुर्गाहून उंच पर्वत। वानरीं आणोनियां त्वरित। अकरा वीर वेंघोनि तेथ। राक्षसांत मांडिला॥२५॥ तें देखोनि वानर। अवघीं आणोनि गिरिवर। त्यांवरीं वेंघोनि सत्वर। राक्षसमार मांडिला॥२६॥ लंकाचौपासीं वानर। पर्वताग्रीं महावीर। करीत रामनामाचा गजर। आले दुर्धर युद्धार्थ॥२७॥ लंकेआंत अति आकांत। देखोनियां लंकनाथ। करावया वानरांचा अंत। स्वयें धाडित निजयोद्धे॥२८॥

रुद्धां तु नगरीं श्रुत्वा जातक्रोधो निशाचरः। विधानं द्विर्गुणं कृत्वा प्रासादं चाप्यरोहतः॥६॥
ते हयैः कांचनापीडैर्गजैश्चाद्भुतदर्शनैः। रथैश्चादित्यसंकाशैः कवचैश्च मनोरमैः॥७॥
विनिर्जग्मुर्महावीरा नादयंतो महीतलम् । राक्षसा भीमकर्माणो रावणस्य जयैषिणः॥८॥
वानराणामपि चमूर्महती जयमिच्छताम् । युद्धतां तु तदा तेषां वानराणां महात्मनाम्॥९॥
राक्षसां च बभूवाथ बलकोपसुदारुणः॥१०॥

रावणाची प्रतिकारार्थ आज्ञा : वानरीं रोधिलें लंकाभुवन। ऐसें ऐकोनि दशानन। कराया वानरांसीं रण। युद्धार्थीं आपण स्वसैन्य धाडी॥२९॥ देखोनियां वानर प्रबळ। त्यांहूनि द्विगुणित राक्षसदळ। नावानिगे[5] वीर सकळ। रणकल्लोळ करूं धाडी॥३०॥ अश्वसैन्य सहपरिवारीं। सुवर्णाभरणें[6] त्यांमाझारी। हो हो मा मा जी जी करीं। वीर संभारीं चालिलें॥३१॥ गजसैन्याचे पैं थाट। मदोन्मत्त अति उद्भट। दंती मणिबंध तिखट। ते गजघंट[7] असंख्य॥३२॥ सन्नद्ध बद्ध शस्त्रास्त्रीं। चालिल्या रथांचिया हारी। ध्वज पताका

शब्दार्थ : १. वीरवृत्ती, पराक्रम, २. स्तुतिपाठकपणा, ३. शत्रुनाश, ४. युद्धाच्या उत्कंठेने, ५. नामांकित ६. सोन्याचे अलंकार, ७. गजसमूह.

त्यांवरी। झळकती झालरी मोत्यांच्या॥३३॥ अढाऊ[१] चव्हाण कोयतकार[१]। सेळीं[१] साबळी धनुर्धर। आले पायाचे मोगर[२]। वीर दुर्धर गर्जती॥३४॥ रत्नें मुक्ताफळें हिरा। कवचें बाणलीं महावीरां। अश्वीं झळकती पाखरा[३]। शस्त्रसंभारें लखलखित॥३५॥ राक्षसवीर आतुर्बळी। दिधली सिंहनादें आरोळी। निधा[४] उठला पाताळीं। नाद निराळीं[५] कोंदला॥३६॥ देखोनि राक्षसांचा भार। युद्धा खवळले वानर। रामनामाचा गजर। दिधला भुभुःकार महावीरीं॥३७॥ लंकाद्वारीं राक्षसकोटी। दोही सैन्यां दृष्टादृष्टी। सुटली शस्त्रास्त्रांची वृष्टी। कांपत पोटीं यमकाळ॥३८॥ राक्षसवीर स्वयें गर्जती। विजयी आमुचा लंकापती। वानर रामनामें गर्जती। रघुपति निजविजयी॥३९॥ वीरां वानरां होत मेळ। रणीं उठिला हलकल्लोळ। खवळला रणवेताळ। रणगोंधळ नाचत॥ ४०॥ एक हाणिती शक्तिशूळें। दुजे हाणिती शालताळें। एक वर्षती शरजाळें। दूजे अंतराळें महाशिळा॥४१॥ एक हाणिती चेंडूचक्रें। दुजे हाणिती शिळाशिखरें। एक हाणिती तोमरें। वृक्षाग्रें पैं एक॥४२॥ वीर वर्षती विचित्र बाण। वानर वर्षती पाषाण। परिघ हाणितां दारुण। तत्काळ मरण राक्षसां॥४३॥ करितां शस्त्रास्त्रीं घात। वानर वर्षती पर्वत। अश्वगजां चूर होत। रथ मोडत ध्वजेंसीं॥४४॥ वानरवीर भद्रजाती[६]। पुच्छीं बांधोनियां हस्ती। बळें उपडितां क्षिती। असंख्य मरती पायांचे॥४५॥ निधडे वीर पडिले ठायीं। पायींचे रगडिले पायीं। वानरां शिवणें नाहीं भुयी। मारीत पाहीं गगनस्थ॥४६॥ वानरवीरीं घालोनि उडी। रथ भंगिले कोट्यनुकोटी। रणीं मर्दिली रणघोडीं। गजकरवडी पाडिल्यां॥४७॥ राक्षसीं वानरांचा करितां घात। कपि उसळती गगनांत। तेथोनि करिती पर्वतपात। वीर मारित असंख्य॥४८॥ वानर धायवट होत। श्रीरामपदरजें पायवणी[७] सेवीत। सर्वेचि येवोनि युद्धाआंत। वीर मारीत रणमारें॥४९॥

**श्रीरामनामस्मरणाने पुनः युद्धास प्रवृत्त :** वानरवीर पडतां रणीं। रामनामाच्या स्मरणीं। मरण पळे त्यांपासूनी। उठती रणीं रणमारा॥५०॥ श्रीराम असतां पाठीसीं। भय नाहीं वानरांसी। रणीं मर्दूनि राक्षसांसी। अति संत्रासीं त्रासिले॥५१॥ करितां रामनामस्मरण। तेथें रिघों न शके मरण। तो श्रीराम असतां जाण। वानरां निधन[८] असेना॥५२॥ न चले आंगिक[९] निजबळ। शस्त्रास्त्रें सुटलीं सकळ। वानरवीर अति प्रबळ। राक्षसदळ भंगलें॥५३॥ मारितां राक्षसांच्या श्रेणी। अशुद्ध[१०] वाहों लागलें धरणीं। जाली मासांची चिडाणी[११]। उरले जे रणीं ते पळताती॥५४॥ मोडलें देखोनि निजसैन्यासी। कोप आला इंद्रजितासी। तोही निघाला युद्धासीं। अति आवेशीं सन्नद्ध॥५५॥

**एतस्मिन्नंतरे तेषामन्योन्यमभिधावताम् । रक्षसां वानराणां च द्वंद्वयुद्धमवर्तत॥११॥**

चोवीस जण वानरवीर। चोवीस योद्धे निशाचर। द्वंद्वयुद्ध घोरांदर। सविस्तर अवधारा॥५६॥ इंद्रजित आणि अंगद। दोघा जणा द्वंद्वयुद्ध। प्रजंघ अतिक्रुद्ध। करित युद्ध संपातीसीं॥५७॥ अतिकाय रावणपुत्र। विनीत आणि रंभुवानर। या दोघांसी युद्ध दुर्धर। करी सत्वर अति युक्तीं॥५८॥ महोदर आणि सुषेण। मकराक्ष जांबुवंतेंसी रण। विद्युज्जिव्हा शातबळी जाण। गजप्रतापनां द्वंद्वयुद्ध॥५९॥ जांबवंताचा बंधु धूम्र। त्यासीं कुंभकर्णपुत्र। देवांतक रावणकुमार। गवाक्ष वीर तेणेंसीं॥६०॥ सारण आणि कपि ऋषभ। त्रिशिरा आणि शरभ। नरांतकपुत्र प्रगल्भ। पनस स्वयंभ तेणेंसीं॥६१॥ अकंपन आणि कुमुदहारी। धूम्राक्ष आणि केसरी। महापार्श्व गंधमादनावरी। शुकरणाग्रीं वेगदर्शी॥६२॥ जंबुमाळीसीं हनुमान

शब्दार्थ : १. सैन्यांतील वीरविशेष, २. पायदळ, ३. झुली, ४. प्रतिशब्द, ५. आकाशात, ६. उत्तम जातीचे, ७. पादोदक, चरणतीर्थ, ८, मरण, ९. शारीरिक १०. रक्त, ११ खच.

आपण। मित्रघ्नेंसीं बिभीषण। निकुंभ नीळेंसीं महारण। तपन तो जाण नळासीं॥६३॥ प्रघसा सुग्रीवासीं रण। विरूपाक्ष आणि लक्ष्मण। अशनिप्रभा द्विविदकंदन। वज्रमुष्टि पूर्ण मैंदासीं॥६४॥ ऐसे चोवीसही जोडे। युद्धा मिसळले गाढे। युद्ध केलें पडिपाडें[१]। निजनिवाडें अवधारा॥६५॥ वाजंत्र्यांच्या निजगजरीं। ढोलनिशाण टमकी भेरी। सिंहनाद करोनि वीरीं॥ परस्परीं मिसळले॥६६॥ इंद्रजित अतिविंदानी। अंगद लक्षोनियां रणीं। शस्त्रास्त्रें वर्षोनि बाणीं। येरें चुकवोनी सांडिलीं॥६७॥ अंगदाच्या हृदयभेदा। करावया सोडिली दुर्धर गदा। गगना उसळला योद्धा। घावो नुसता तळीं गेला॥६८॥

**इंद्रजित अंगद यांचे द्वंद्वयुद्ध :** तेथोनि घालोनियां उडी। सारथीसहित मारिलीं घोडीं। रथ भंगिला कडाडी। छत्रें मोडिलीं पुच्छाग्रें॥६९॥ इंद्रजित धाकें घालिता उडी। वानर मुकुटातें आसुडी[२]। सवेंचि देतां पैं थापडी। आली भवंडी प्राणांता॥७०॥ पूर्वील हनुमंतआघात। तेणें इंद्रजित नित्य धाकत। पुढती अंगदाचा घात। आला प्राणांत रोकडा॥७१॥ वानरें केला अस्ताव्यस्त। मोकळे केशीं आणि विरथ। पळों जातां लंकेआंत। लज्जान्वित इंद्रजित॥७२॥ पळोनि जातां इंद्रजितासी। अंगदें धांवोनि धरिला केशीं। येरें कापूनि बुचड्यासी। अंतर्धानेंसीं पळाला॥७३॥ रणीं वानरासीं संमुख। युद्धीं माझें न सरेचि मुख। इंद्रजितासी परम दुःख। पोटीं आणिक तेणें धरिलें॥७४॥ करोनियां निःसीम युद्ध। रामलक्ष्मणादि कपि सन्नद्ध। अवघियां करीन शरबद्ध। ऐसें विरुद्ध मनीं धरिलें॥७५॥

**अन्य वीरांची द्वंद्वयुद्धे :** येरीकडे द्वंद्वयुद्ध। वीरां वानरां अति उन्नद्ध। आयणीपायणीचे बाध। तेंही युद्ध अवधारा॥७६॥ प्रजंघ वीर तीं बाणीं। संपाती कपि विंधिला रणीं। तेणें ते बाण चुकवूनी। अश्वकर्णी ठोकिला॥७७॥ अश्वकर्णाऐसीं पत्रें पूर्ण। तो वृक्ष म्हणती अश्वकर्ण। तेणें तो वृक्ष ठोकून। मूर्च्छापन्न प्रजंघ॥७८॥

**अतिकाय आणि रंभु यांचे द्वंद्वयुद्ध :** अतिकायसुत रावणी। रंभु विनीत वानर दोनी। पाचारूनि रणांगणीं। अमितां बाणीं विंधलें॥७९॥ वंचूनि त्याचे बाण दुर्धर। कोपें खवळले वानर। वर्षले शिळा पर्वत घोर। केले चकचूर राक्षस॥८०॥ अतिकाय पर्वतपातीं। धनुष्य भंगून ठेंचला लातीं। रथ भंगून सारथी। पडिला क्षितीं[३] मूर्च्छित॥८१॥ महोदरें रणीं सुषेण -। हृदयीं विंधिले पांच बाण। तेणें त्याचा जावा प्राण। रामस्मरणें जाण वांचला॥८२॥ करितां रामनामस्मरण। आलें चौगुणें[४] स्फुरण। पंच योजनें शिळा दारुण। घाली सुषेण त्यावरी॥८३॥ महोदरें लवडसवडी॥ लंकेमाजी घातली उडी। रथ सारथी मारिलीं घोडीं। सैन्य शिळेबुडीं असंख्य॥८४॥ मकराक्ष खरात्मज। जांबवंत ऋक्षराज। दोहींसीं युद्धाचें व्याज[५]। रणसमाज रणमारें॥८५॥ जांबवंत घेवोनि वृक्ष। रणीं ठोकिला मकराक्ष। येरें छेदोनियां देख। बाण असंख्य वर्षला॥८६॥ जांबवंतें करतळीं। हाणोनि पाडिला सभामंडळीं। रावणाच्या पायांजवळी। मूर्च्छासमेळीं मकराक्ष॥८७॥ जांबवंतें करांगुळीं। मर्दून सैन्य केली रांगोळी। रथसूतअश्वसमेळीं। मेळविला धुळी मकराक्ष॥८८॥ विद्युज्जिव्ह राक्षस बळी। बाणीं विंधिला शतबळी। अश्वपर्णवृक्ष पैं कपाळीं। हाणोनि तळीं पाडिला॥८९॥ गज आणि प्रतपन। दोघीं केलें दुर्धर रण। वाम पार्श्वी गजासी जाण। शूळें संपूर्ण खोंचिलें॥९०॥ गज क्षोभला दुर्धरशक्ती। शालवृक्ष घेवोनि हातीं। हाणून लघुलाघवगतीं। पाडिला क्षितीं प्रतपन॥९१॥

**कुंभ-धूम्राक्ष द्वंद्वयुद्ध :** कुंभ जो कां कुंभकर्णकुमर। जांबवंतबंधु धूम्राक्ष वीर। दोघां

शब्दार्थ : १. पराकाष्ठेचें, २. हिसका दिला, ३. पृथ्वीवर, ४. चौपट, ५. कार्य निमित्त.

द्वंद्वयुद्ध दुर्धर। येरां येर नाटोपती॥९२॥ दोघे वीर आतुर्बळी। रणीं विचरत सैन्यमेळीं। गदापट्टिशतोमरत्रिशूळीं। शालताळीं वानर॥९३॥ धूम्रें हाणितां पायावरी। कुंभ मूर्च्छित जाय चांचरी[१]। सेवकीं नेला लंकेमाझारीं। जाली महामारी राक्षसां॥९४॥

देवांतक व गवाक्षाचे द्वंद्वयुद्ध : देवांतक जो रावणी। गवाक्ष विंधिला पांच बाणीं। तेणें ठेंचून पाय पाषाणीं। तत्क्षणीं मोडिले॥९५॥ गवाक्ष कोपोनि वानर। शालवृक्ष उपडोनि थोर। रागें हाणों जातां रावणपुत्र। तेणें तो सत्वर छेदिला॥९६॥ आणिक विंधितां नव बाण। गवाक्षें वरिचेवरी झेलून। मग शिळा शिखरें वर्षोन। केलें कंदन देवांतका॥९७॥ धनुर्बाण शस्त्रें सारथी। अश्वरथ उपडिला क्षितीं। देवांतक वीर पदाती। मुष्टिघातीं मिसळला॥९८॥ उरीं शिरीं खांदां कोपरीं। दंडीं मुंडपीं थडका उरीं। तडवें[२] हाणोनि परस्परीं। चक्राकारीं भवंडिले॥९९॥ दोघे पुरुषार्थी दादुले। उसण्याघाईं[३] भिडिन्नले। दोघे श्रमस्वेदें क्लिन्न[४] जाले। दोघे पडिले मूर्च्छित॥१००॥

सारण, ऋषभ व त्रिशिरा यांचे युद्ध : सारणें वीरें युद्धावरी। ऋषभ पाचारिला रणाग्रीं। एकाएकीं उरावरी। शालवृक्ष ठोकिला॥१॥ वृक्ष आदळतांचि उराडीं[५]। दोहीं डोळां आली भोवंडी। जावोनि अडखळे गडबडीं। पडली मुरकुंडी सारणाची॥२॥ मेघवर्ण कुंजरावरी। त्रिशिरा बैसोनियां गजरीं। वेगें येवोनि शरभावरी। तोमरें शिरीं ताडिला॥३॥ तोमर लागावा जों शिरीं। घाव चुकविला लाघवेंकरीं[६]। सप्तपर्ण तरुसंभारीं। गजकुंभावरी ताडिला॥४॥ गज हाणितां कुंभावरी। वृक्ष आदळला त्रिशिरावरी। दोघे जावोनि चांचरी। धरेवरी लवंडले॥५॥

नरांतक व पनस, अकंपन व कुमुद यांचे द्वंद्वयुद्ध : नरांतक रावणसुत। पनस वानर विख्यात। त्यासीं युद्धकंदनार्थ। बाणीं विंधित ऊठिला॥६॥ येतां देखोनि त्या बाणासी। पनस उडाला आकाशीं। तेथोनि सोडितां पर्वतासी। कासाविसी नरांतक॥७॥ वर्षतां शिळसंपातीं। शिरींचा मुकुट क्षितीं। रथींचा मारिला सारथी। घोडे रथ नेतीं सुनाट[७]॥८॥ घोडी रथ नेला लंकाभिमुख। नरांतक झाला विमुख। कटकीं वाजली एकचि हाक। तें परम दुःख नरांतका॥९॥ अकंपनें कुमुदासीं। परिघें हाणितांचि शिर्सी। मेटें वळलीं वानरांसीं। मग भूमीसीं बैसला॥११०॥ सर्वेचि उठोनि उठा उठीं। अकंपनें देखोनि दृष्टीं। कुमुदें हाणितां मुष्टी। पडिला सृष्टीं निर्जीव॥११॥ धूम्राक्ष आणि केशरी। युद्ध करितां चक्राकारीं। एक वर्षे शरधारीं। शिळाशिखरीं पैं दुजा॥१२॥ केसरी उडोनि प्रत्यक्ष। पायीं धरोनि धूम्राक्ष। बळें भोंवंडोनि देख। अधोमुख[८] पाडिला॥१३॥ महापार्श्व गंधमादन। दोघीं युद्ध केले दारुण। शस्त्रास्त्रीं बाण पाषाण। रणकंदन अत्युग्र॥१४॥ गंधमादनें लवडसवडी[९]। महापार्श्वावरी घालोनि उडी। बळें झोंबून कडाडीं। तडाफोडी तो केला॥१५॥ पुच्छें आकळोनि स्पष्ट। नखीं नांगरिलें पोट। दांतीं करांडिला कंठ। रणीं यथेष्ट गांजिला॥१६॥ वेगदर्शी वीर वानर। शुक लाघवी[१०] निशाचर। दोघां युद्ध घोरांदर[११]। अति दुर्धर तीहीं केलें॥१७॥ वेगदर्शी स्वयें उडोन। रथ उपटितां जाण। अश्व सारथि जाले चूर्ण। शुक पळोन स्वयें गेला॥१८॥

तपन व नळ यांचे द्वंद्वयुद्ध : तपन आणि वानर नळ। दोघीं युद्ध केलें तुंबळ। नळें थाप देवोनि सबळ। डोळे तत्काळ फोडिले॥१९॥ तपन जालें आंधळें। युद्ध करीना मागें पळे। पडिलें रणभूमीसीं लोळे। मग तें नळें उपेक्षिलें॥१२०॥ पूर्वी जंबुमाळी जाण। हनुम्यानें

---

शब्दार्थ : १. झेपा देत, २. चपराका, ३. समोरासमोर, ४. भिजलेले, ५. छातीवर, ६. मोठ्या युक्तीने, ७. पाहिजे तिकडे, ८. खाली तोंड असा, ९. तांतडीने, घाईने. १०. कुशल, ११. भयंकर.

मारिला आपण। त्याचा सूड घ्यावया पूर्ण। जंबु आन स्वयें आला॥२१॥ जंबु झाला पैं रथस्थ। रथव्युत्पत्ती दावी समस्त। तेणें तीं बाणीं हनुमंत। हृदयआंत विंधिला॥२२॥ हनुमंत वज्रदेही। बाण विंधिल्या नव्हे कांहीं। ते बाण उसळोनियां पाहीं। जंबूच्या देही खडतरले॥२३॥ तयाच्या लघुलाघवाआंत। रथीं येवोनि हनुमंत। तळप्रहारें शिरःपात। जंबु रणांत पाडिला॥२४॥ मित्रघ्न चापविंदानी[1]। बिभीषण विंधिला बाणीं। बिभीषणें गदा हाणोनी। पाडिला धरणीं मित्रघ्न॥२५॥ सैन्य त्रासित घसाघस। अति बळी वीर प्रघस। स्वयें जिणावया सुग्रीवास। रणाभिवेष युद्धार्थी॥२६॥ प्रघस जंव सोडी बाण। तंव सुग्रीवें आपण। वृक्ष घेवोनि सप्त पूर्ण। घेतला प्राण प्रघसाचा॥२७॥ सुग्रीवाच्या घायापुढें। प्रघस कायसें बापुडें। घायें चूर केलीं हाडें। अशुद्ध[2] उडे आकाशीं॥२८॥

विरूपाक्ष-लक्ष्मणाचे युद्ध : विरूपाक्ष आणि लक्ष्मण। दोघीं आरंभिलें लाघवी रण। लक्ष्मणें विंधोनि बिकट बाण। घेतला प्राण बाणें एकें॥२९॥

वज्रमुष्टी मैंद व द्विविद यांचे युद्ध : वज्रमुष्टीसीं कपि मैंद। दोघां जालें दुर्धर युद्ध। घाय हाणोनि विविध। रणविमर्द तिहीं केला॥१३०॥ वज्र मुष्टी[3] सुनी दृष्टी। मैंद हाणितां निजमुष्टीं। घायें पाडियेला सृष्टीं। जेंवी धूर्जटी[4] त्रिपुरातें॥३१॥ द्विविद अशनीपडिपाडीं। युद्धीं द्विविदें मारिली घोडीं। रथ मोडितां कडाडीं। पाडिली मुरकुंडी अशनिप्रभा॥३२॥

निकुंभ व नीळ यांचे तुंबळ युद्ध : निकुंभ आणि सेनानी नीळ। दोघां जाहलें तुंबळ। निकुंभें सोडूनि शरजाळ। मिळासी तत्काळ उपहासी॥३३॥ तूं तंव वानर बापुडें। केंवी राहसी मजपुढें। रणीं मारीन रोकडें। निजकुऱ्हाडें[5] सोडिलें॥३४॥ निकुंभाचे सतेज शर। पुच्छें छेदोनि समग्र। घेवोनि त्याचें रथचक्र। छेदोनि शिर पाडिला॥३५॥

यज्ञकेत, शतघ्न, रश्मिकेत व यज्ञकोपन यांचे आगमन : रावणाच्या सैन्याआंत। चौघे जण वीर विख्यात। दृष्टीं नाणितां लंकानाथ। बळोद्भुत अति बळी॥३६॥ गाढी बळाची आंगवण। वानरवीर अति दारुण। अवघे लेखिती तृण। श्रीरामीं रण करूं आले॥३७॥ यज्ञकेत आणि शतघ्न। रश्मिकेत यज्ञकोपन। चौघे वीर अति दारुण। रामीं रण करूं आले॥३८॥ चौघें जण येतां देख। हनुमान म्हणे हे रंक मशक। मी असतां सिद्ध सेवक। धुरेसंमुख केंवीं येती॥३९॥ मारावया चौघे जण। हनुमंतासीं आंगवण। सवेग करितां उड्डाण। गेलें किराण सत्यलोका॥१४०॥ लघुलाघवी चौघे जण। विकट विचित्र विंदान। श्रीरामासीं विंधोन बाण। रणगर्जन तिहीं केलें॥४१॥ धन्य धनुर्वाडा श्रीरामचंद्र। त्यांचे निवारोनियां शर। चौघांचेही छेदोनि शिर। रणीं महावीर मारिले॥४२॥ वेगविंदानी श्रीरघुनाथ। परतोनि ये हनुमंत। तंव चौघांचाही करोनि घात। केलें विपरीत तें एका॥४३॥ शिरें छेदितां आवेशीं। वेगें उडाली आकाशीं। गगनीं भेटलीं हनुमंतासी। गुह्य त्यापासीं सांगत॥४४॥ सवेग हस्ते श्रीरघुनाथ। शिरें छेदोनि केलीं मुक्त। तुझा अबळ पुरुषार्थ। आता कां व्यर्थ धांवसी॥४५॥ ऐकोनि शिरांचे वचन। निराळीं हनुमान लज्जायमान। वंदोनि श्रीरामचरण। जीवें निंबलोण[6] स्वयें केलें॥४६॥ हनुमान म्हणे मी शीघ्रगती। ऐसा गर्व होता चित्तीं। त्याहून श्रीराम शीघ्रहस्ती। वानूं किती पुरुषार्थ॥४७॥

भल्लैः खड्गैर्गदाभिश्च शक्तितोमरसायकैः। अपविद्धैश्च भग्नैश्च रथैः सांग्रामिकैर्हयैः॥१२॥
निहतैः कुंजरैर्मत्तैस्तथा वानरराक्षसैः। चक्राक्षयुगदंडैश्च भग्नैर्भूतलमाश्रितैः ॥१३॥
बभूवादौ घनं घोरं गोमायुगणसंकुलम्। कबंधानि समुत्पेतुस्तस्मिन्युद्धे सुदारुणे ॥१४॥

शब्दार्थ : १. बाणयुद्धांत अति कुशल, २. रक्त, ३. घालून, ४. महादेव, ५. आपला बाण, ६. कुरवंडी.

असंख्य शस्त्रास्त्रांचा खणखणाट : खड्ग भाले शूळशक्तीं। गदातोमरबाणगुप्तीं। रथ भंगिले नेणों किती। निमाले हस्ती असंख्य ॥४८॥ रथ मोडितां कडाडीं। सारथ्यांची मारिलीं घोडीं। सांग्रामिक हय कोडी। रणीं पडिपाडीं पाडिले ॥४९॥ रुधिराची[1] नदी दुर्गम। मांसशोणितान्चा कर्दम[2]। वृकव्याघ्रादि गृध विहंगम[3]। मांसें सुगम[4] भक्षिती ॥१५०॥ शस्त्रास्त्रेंसीं सन्नद्ध[5]। रणीं उठले कबंध। करावया दुर्धर युद्ध। रणीं विविध धांवती ॥५१॥ कोटिसैन्य पडिल्याअंतीं। शस्त्रें घेवोनियां हातीं। शिरेंवीण धडें धांवती। कबंध म्हणती त्या नांव ॥५२॥ एका जनार्दना शरण। जाले द्वंद्वयुद्ध दारुण। पुढील कथा रणविंदान। युद्धदारुण अवधारा ॥५३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्कांडे एकाकारटीकायां द्वंद्वयुद्धनिरूपणं नाम नवमोऽध्यायः ॥९॥ ओव्या ॥१५३॥ श्लोक ॥१४॥ एवं ॥१६७॥

# अध्याय दहावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## इंद्रजिताला मांत्रिक रथाची प्राप्ती

युद्ध चालू असता रात्र झाली : रणीं करितां द्वंद्वयुद्ध। इंद्रजित गांजिला सुबद्ध। त्याचे पोटीं अति विरुद्ध। रात्रीं शरबंध करावया ॥१॥ प्रथम गांजिलें हनुमंतें। तें बहु दुःख इंद्रजितातें। अंगदें गांजितां येथें। अति लज्जेतें पावला ॥२॥ अपमानाचें अति विरुद्ध। रामलक्ष्मणादि वीर विविध। रणीं करावया शरबंध। रात्रीं युद्ध मांडिलें ॥३॥

युद्ध्यतामेव तेषां तु तदा वानररक्षसाम् । रविरस्तंगतो रात्रिः प्रवृत्ता प्राणहारिणी ॥१॥
अन्योन्यं बद्धवैराणां घोराणां जयमिच्छताम् । संप्रवृत्तं निशायुद्धं तदा वानररक्षसाम् ॥२॥
राक्षसोऽसीति हरयो वानरोऽसीति राक्षसाः। अन्योन्यं समरे जघ्नुस्तस्मिंस्तमसि दारुणे ॥३॥
हत दारय चैहीति कथं विद्रवसीति च । एवं सुतुमुलः शब्दस्तस्मिंस्तमसि शुश्रुवे ॥४॥

रात्रीचा फायदा घेऊन इंद्रजीताचा शरबंध प्रयोग : रणीं भिडतां वानरवीर। राक्षस गांजिले थोर थोर। निबिड पडावया अंधकार। निशा निशाचर इच्छिती ॥४॥ रात्रीं प्रबळ निशाचर। तेथें निर्बळ वानर। ऐसा करितां विचार। दिवाकरअस्त[६] जाला ॥५॥ निजबळें सबळ रजनी[७]। सुषुप्ति प्राण्यां प्राणहरणी। तें गुडुप पडतां रणीं। कोणा कोणी देखेना ॥६॥ अरे तूं काय होसी वानर। कपीसीं पुसती निशाचर। पडखळोनि[८] येरयेर। रणीं सत्वर मारिती ॥७॥ राक्षसां वानरां बद्धवैर। राक्षसां साह्य अंधकार। वानरां साह्य श्रीरामचंद्र। युद्ध दुर्धर मांडलें ॥८॥ छेदीं भेदीं रणीं पाडीं। पायीं धरोनियां ओढीं। वेगीं उपटा रे तांतडीं। वीर कडाडीं गर्जती ॥९॥ आमुचा अधिक पुरुषार्थ । इतर मशकें कायसीं येथ। ऐसें अंधारीं गर्जत। करीत घात येरयेरां ॥१०॥ पाडीं पाडीं म्हणती रणीं। मिसळल्या वीरश्रेणी। युद्ध होतसे झोंटधरणी[९]। मागें कोणी न सरती ॥११॥

तस्मिंस्तमसि दुःपारे राक्षसाः क्रोधमूर्च्छिताः । परिपेतुः सुसंक्रुद्धा भक्षयंती वनेचरान् ॥५॥
हयान्कांचनपीडांश्च ध्वजांश्चाभरणानि च । आप्लुत्य दशनैस्तीक्ष्णैर्नखैश्च विचकर्षिरे ॥६॥
कुंजरान्कुंजरारोहान्पताकाध्वजिनो रथान्। आप्लुत्य विचकर्षुस्ते दशनैः क्रोधमूर्च्छिताः ॥७॥
लक्ष्मणस्त्वथ रामश्च शरैराशीविषोपमैः। आदिश्यादिश्य रक्षांसि प्रवराणि निजघ्नतुः ॥८॥
तुरंगखुरविध्वस्तं रथनेमिसमुद्धतम् । रुरोध कर्णौ योधानां चक्षूंषि च महीरजः ॥९॥

---

शब्दार्थ : १. रक्ताची, २. चिखल, ३. पक्षी, ४. अनायासे, ५. तयार, ६. सूर्यास्त, ७. रात्र, ८. उठवून, ९ केस धरून.

आपणा न दिसे आपुलें शरीर। तेथें कोण देखे येरयेर। तमोबळें निशाचर। युद्धार्थदुर्धर पेटले ॥१२॥

**वानरांची प्रतिक्रिया आणि रावणास प्रधानांचे उत्तर :** निशाबळें निशाचरीं। लावून आले निशाण भेरी। नाद ऐकोनि वानरीं। राक्षसभारीं[1] मिसळले ॥१३॥ वानर धरोनि अंधारांत। राक्षस मुखीं खावों घालित। दांती करांडून[2] दांत। जिव्हां तोडित नखाग्रीं ॥१४॥ कपि घालितां मुखांतरीं। रिघोनियां कर्णद्वारीं। लात हाणोनियां शिरीं। धरेवरी[3] पाडिती ॥१५॥ वानर खावों सुती[4] पोटीं। ऊर्ध्व उडोनि जगजेठी। फोडून ब्रह्मांडकवटी[5]। राक्षसां सृष्टीं पाडिती ॥१६॥ सुवर्णाभरणीं शोभती गाढे। रणीं पाखरिले पैं घोडे। त्यांवरी उडउडोनि माकडें। रणीं रोकडे पाडिती ॥१७॥ नखीं चिरोनि उदर। मुखीं फाडोनि पाखर। रणीं पाडिती मुख्य धुर। असिवारासमवेत[6] ॥१८॥ पताका फाडोनियां दातीं। गजदंत उपटोनियां घेती। रणीं पाडोनि गजपती। मारिले हस्ती असंख्य ॥१९॥ वानरी घालोनियां उडी। रथसारथीं सहित घोडीं। मोडिल्या रथांचिया कोडी। रणपरवडी राक्षसां ॥२०॥ राक्षसें हाणितां नाना शस्त्रीं। वानर उडाले अंबरी[7]। वृथा घाय जाती अंधारीं। राम साहाकारी वानरां ॥२१॥ श्रीराम तेजें निरंतर। अंधारीं देखणे वानर। तिहीं मारिले निशाचर। सैन्य समग्र रणमारें ॥२२॥ रणीं पाडोनि निशाचर। सैन्य मारोनि समग्र। रामनामाचा गजर। केला भुभुःकार वानरीं ॥२३॥ येरीकडे राम सौमित्र। मुख्य धुरा थोर थोर। नावानिगे[8] निशाचर। रणीं समग्र मारिले ॥२४॥ सुवर्णपत्री कंकपत्री। बाण वर्षोनि बहुपत्री। मारिल्या राक्षसांच्या हारी। रणमहामारी श्रीराम ॥२५॥ रथ छेदिले सचक्र। छेदिले अश्वांचे खुर। कंठनाळ छेदूनियां वीर। रणीं समग्र पाडिलें ॥२६॥ शुंडादंड दांतेंसहित। छेदोनि पाडिले गजघट। वीरांचे छेदोनि नेत्रवाट। रणीं सुभट पाडिले ॥२७॥ श्रीराम देखणा अंधारीं। वायकांड[9] नाहीं करीं। पाचपाचारूनि[10] धुरा थोरी। रणमहामारीं मारिल्या ॥२८॥ श्रीराम वर्षोनि बाणजाळ। सैन्यासगट धुरा प्रबळ। क्षणें मारिल्या सकळ। हलकल्लोळ उठिला ॥२९॥ रावण म्हणे प्रधानांसी। मारूं म्हणां श्रीरामासी। तो करितो रणकंदनासी। तुम्ही युद्धासी कां न[11] वचां[11] ॥३०॥ सत्य बोलिला बिभीषण। त्याचे वचन अति प्रमाण। करावया श्रीरामासीं रण। आंगवण नाहीं तुम्हां ॥३१॥ ऐकोनि रावणाचें वचन। स्वयें विनविती प्रधान। न होतें आज्ञापन। म्हणोनि रण नाहीं केलें ॥३२॥ रावणवचनें लज्जायमान। युद्धा निघाले प्रधान। नावानिगे साही जाण। रणप्रवीण ते ऐका ॥३३॥

यज्ञशत्रुश्च दुर्घर्षो महापार्श्वमहोदरौ । वज्रदंष्ट्रो महाकायस्तौ चोभौ शुकसारणौ ॥१०॥
तेषां रामः शरैः षड्भिः षड् जघान निशाचरान्। निमेषांतरमात्रेण घोरैरग्निशिखोपमैः ॥११॥
ते तु रामेण बाणौघैर्लघुहस्तेन ताडिताः। युद्धादपसृतास्तत्र सावशेषायुषोऽभवन् ॥१२॥
सुवर्णपुंखैर्विशिखैः संपतद्भिः समततः। दिशश्चकार विमलाः प्रदिशश्च महाबलः ॥१३॥
ये त्वंन्ये राक्षसा वीरा रामस्याभिमुखे स्थिताः। तेऽपि नष्टाः समासाद्य पतंगा इव पावकम् ॥१४॥

श्रीरामासीं करावया रण। नावानिगे जे प्रधान। युद्धा आले सहाही जण। कोण कोण ते ऐका ॥३४॥ महापार्श्व महोदर। वज्रदंष्ट्र हमाकाय वीर। शुक सारण चतुर। सहाही दुर्धर युद्धार्थी ॥३५॥

शब्दार्थ : १. राक्षसांच्या सैन्यांत, २. चावून, ३. पृथ्वीवर, ४. घालिती, ५. मस्तक, ६. स्वारांसहित, ७. आकाशांत, ८. नावाजलेले, ९. वायबाण, १०. बोलबोलावून , ११. जात नाही.

**रामाने केलेली दुर्दशा व त्यांचे पलायन :** निजसैन्याचा कडकडाट। महारथाचा घडघडाट। श्रीरामासंमुख उद्भट। वीर वरिष्ठ पैं आले ॥३६॥ येतां देखोनि सहाही जण। त्यांचा निःशेष घ्यावया प्राण। रामें सज्जिले सहा बाण। वेगविंदान तें ऐका ॥३७॥ सहाही जणीं धनुष्यातें। निर्वाणबाण सज्जिले तेथें। विंधों जातां श्रीरामातें। तंव रघुनाथें विंधिले ॥३८॥ त्यांचे छेदोनि चाप बाण। रथ सारथि करोनि चूर्ण। धुळी मेळवोनि सहाही जण। मुकुट छेदून पाडिले ॥३९॥ जरी ते रणीं न देत पाठी। राम मारिता जगजेठी। आयुष्य होतें अदृष्टीं। देवोनि पाठी पळाले ॥४०॥ श्रीराम न मारी पळत्यातें। हें तिहीं पूर्वीं ऐकिलें होतें। वांचवावया जीवितातें। रणीं रामातें विमुख[1] झाले ॥४१॥ पळतां देखोनि प्रधान। स्वयें हांसती वानरगण। तरी ते पलायमान। रामबाणाभेण सलज्ज ॥४२॥ पळालिया ते प्रधान। त्यांचे सेनानी आणि सैन्य। रामें केलें रणकंदन। दुर्धर बाण वर्षोनी ॥४३॥ सुवर्णकवची वीरश्रेणी। खिळोनि सांडिले धरणी। असंख्य वीर शिरें छेदूनी। पाडिले रणीं हुंबत[2] ॥४४॥ जो रणीं मिरवी हात। बाणीं होत शिरःपात। जो रणीं हाक देत। जिव्हा सदंत छेदी बाणें ॥४५॥ यापरी रामें रणांगणीं। धडमुंडांकित[3] केली धरणी। उरले ते जीव घेवोनी। गेले पळोनी लंकेसी ॥४६॥

> ततः क्रोधसमाविष्टः शरवर्षेण रावणिः। अंगदस्य चमूं घोरां नाशयामास सर्वतः ॥१५॥
> ततः क्रोधपरीतात्मा युवराजोंऽगदो बली। शिलामुत्पाटयामास बाहुभ्यां प्रणदन्मुहुः ॥१६॥
> तां समुत्क्षिप्य तेजस्वी छादयानः शरोर्मिभिः। रथं बभंज वेगेन शिलया कपिकुंजरः ॥१७॥
> वर्तमाने चातिरौद्रे संग्रामेऽतिभयंकरे। अंगदो विरथं कर्तुं रावणिं समुपाद्रवत् ॥१८॥
> इंद्रजित्तं रथं त्यक्त्वा हताश्वो हतसारथि। अंगदेन महामायस्तत्रैवांतरधीयत ॥१९॥

**अंगदाकडून इंद्रजितावर शिळाप्रहार व त्याचे अंतःर्धान :** प्रधान पळाले त्वरान्वित। सैन्य भंगलें समस्त। ते काळीं इंद्रजित। अंगदसैन्यांत मिसळला ॥४७॥ इंद्रजित हनुर्वाडा चपळ। रागें वर्षत बाणजाळ। अंगदसैन्या हलकल्लोळ। रणकल्लोळ मांडला ॥४८॥ निजसैन्यासीं आवर्त[4]। तेणें अंगद क्रोधान्वित। रणीं मर्दावया इंद्रजित। केला पुरुषार्थ तो ऐका ॥४९॥ पंचयोजनें सबळ शिळा। अंगद उचली बाहुबळा। त्याच्या छेदोनि बाणजाळा। सवेग शिळा सोडिली ॥५०॥ इंद्रजित विंधी अमित शर। परी ते शिळा दुर्निवार। धाकें सांडूनि रहंवर[5]। पळे सत्वर इंद्रजित ॥५१॥ त्या शिळेच्या निजघातीं। सहितरथाश्वसारथी। इंद्रजित रणांगणीं विरथी। लाविली ख्याती अंगदें ॥५२॥ होतां शिळेचा संपात। तेणें मरावा इंद्रजित। परी तो राक्षस बुद्धिवंत। त्वरान्वित पळाला ॥५३॥ हताश्व हतसारथी। इंद्रजित रणांगणीं विरथी। धनुष्यबाणशस्त्रसंपातीं। शिळासंपातीं शतचूर्ण ॥५४॥ विरथी पळतां इंद्रजितासीं। अंगदें धावोनि धरिला केशीं। येरें कापून बुचड्यासी। लागवेगेंसी पळाला ॥५५॥ अंधारीं पळतां गुप्तगती। अंगदें उडोनि धरितां हातीं। तंव तो अंतर्धानस्थितीं। खेचरगती[6] तडकला ॥५६॥ इंद्रजित पावतां अंतर्धान। अंगदें केलें गडगर्जन। निर्दाळून त्याचें सैन्य। बळवाहन परतला ॥५७॥ द्वंद्वयुद्ध आणि आतांचें रण। दोहीं रणकाळीं आपण। अंगदापुढें पलायमान। अति उद्विग्न इंद्रजित ॥५८॥ प्रथम मज गांजी हनुमंत। अंगदें दोनी वेळां येथ। जळो जळो माझा पुरुषार्थ। केलों हताहत वानरीं ॥५९॥ रणीं न जिंकवती वानर। केंवी जिंकवे रामचंद्र। इंद्रजित स्वयें चिंतातुर। करी अभिचार[7] शरबंधा ॥६०॥

---

**शब्दार्थ :** १. पाठमारे, २. कुंथत, ३. धडांनी व मस्तकांनी चिन्हित, ४. संकट, ५. रथ, ६. आकाशगतीने. ७. जारणमारणप्रयोग.

इंद्रजिताने शिववरदान जागृत करून प्रयोग केला : इंद्रजितासीं शिववरदान। शिवाचें जें सर्पभूषण। तेंचि होवोनियां बाण। शरबंधन वीरांसी ॥६१॥ सर्प जे कां शिवभूषण। तेचि स्वयें होवोनि बाण। भलतैसा वीर विचक्षण। शरबंधीं जाण बांधिती ॥६२॥ केल्या तदर्थ आभिचारिक[१]। रणीं होय फलोन्मुख। येरवीं तें निरर्थक। ऐसें देख शिववरदान ॥६३॥ यालागीं इंद्रजित आपण। करावया आभिचारिक यज्ञ। करिता होय यज्ञसाधन। विधिविधान तें ऐका ॥६४॥

स यज्ञभूम्यां विधिवत्पावकं जुहुतेऽस्त्रवित्। जुहुतस्तस्य तत्राग्निं रक्तपीतांबरस्रजः ॥२०॥
आजहुस्तत्र सामग्रीं राक्षसा यत्र रावणिः। शस्त्राणि शतपत्राणि समिधश्च विभीतकाः ॥२१॥
लोहितानि च वासांसि स्रुवं कार्ष्णायसं तथा। सर्वतोऽग्निं समास्तीर्य शतपत्रैः सतोमरैः ॥२२॥
छागस्य चापि कृष्णस्य कंठं जग्राह जीवतः। शोणितं तत्र विधिवत्स जुहाव रणोत्सुकः ॥२३॥

आरक्त वस्त्र आरक्त माळा। आरक्त शेंदुराचा टिळा। गोरोचनमणींच्या पीत माळा। घातल्या गळां यज्ञसिद्ध्यर्थ ॥६५॥ अभिचारहोमविधानीं। शस्त्रें मंथोनि काढिला अग्नी। रक्तचंदनइंधनीं[२]। पेटविला वन्ही लखलखित ॥६६॥ अग्नि पेटवितां धूम निघे। तैं कर्त्यासीं अपजयो लागे। विधूम[३] ज्वाळा निघतां वेगें। तैं लागवेगें रणविजय ॥६७॥ आणिक तेथील यागविधान। उलूकरक्तें[४] परिसमूहन[५]। शस्त्रांचे परिस्तरण[६]। करी आपण इंद्रजित ॥६८॥ राक्षसीं आणिले शस्त्रसंभार। इंद्रजित प्रोक्षी[७] जपोनि मंत्र। परिस्तरणाचा प्रकार। शास्त्रविचार तो ऐका ॥६९॥ शतपत्रा शतघ्नी। खड्ग त्रिशूळ तोमर बाणीं। गदा मुद्गल गुप्तघ्नी। परिस्तरणीं हीं शस्त्रें ॥७०॥ तिखें काढिलें लोह गाळोनि। त्याच्या स्त्रुवा[८] होमविधानीं। इंद्रजित करीं धरोनी। होमा अवदानीं छागरक्ता[९] ॥७१॥ ज्या छागासी पांढरा तिलक। तेणें यजमाना लागे सीक। निखळ कृष्णवर्ण देख। आवश्यक आणिला ॥७२॥ छाग मारोनि निघता रक्त। होमसिद्धी ते विपरीत। शस्त्रास्त्र निर्जीव होत। नव्हे सामर्थ्य रणमारा ॥७३॥ यालागीं छाग जीवें जीत। त्याचे कंठीचें घेवोनि रक्त। इंद्रजित स्वयें होम करित। जालें विपरीत तें ऐका ॥७४॥ इंद्रजित जपतां मंत्रमेळीं। त्याची बैसली दांतखिळी। स्वयें क्षोभली कंकाळी[११]। क्रोधानुमेळीं वाग्देवी ॥७५॥ रणीं मारावा श्रीरघुनाथ। उच्चारितां हा मंत्रार्थ। वाग्देवता चळीं कांपत। तेणें वचनार्थ खुंटला ॥७६॥

इंद्रजितास मंत्रांचे विस्मरण : श्रीराम जगाचें जीवन। श्रीराम परमात्मा चिद्घन। त्यासीं नाहीं जन्ममरण। मंत्रोच्चारण खुंटलें ॥७७॥ श्रीराम जन्ममरणातीत। श्रीराम सबाह्य सदोदित। त्यासीं सर्वथा न चले घात। मंत्रीं मंत्रार्थ खुंटला ॥७८॥ मंत्रशक्ति जे कंकाळी। शिववरदानशक्ति शूळीं। दोघीं क्षोभोनि क्रोधनळीं। मंत्रार्थशैली खुंटली ॥७९॥ मंत्र नाठवे हृदयकमळीं। शब्द नुच्चारी जिव्हामूळीं। होमसिद्धीच्या निजकाळीं। माझी वचनावळी खुंटली ॥८०॥ नाठवे मंत्रार्थ ना मंत्र। मुखीं नुच्चारे अक्षर। तेव्हा रावणज्येष्ठकुमर। दुःखदुर्धर पावला ॥८१॥ शिववरदेंशीं समर्थ। शरीं बांधावया श्रीरघुनाथ। जो जो केला म्यां पुरुषार्थ। तो तो व्यर्थ मज माझा ॥८२॥ होमसिद्धिकाळ प्राप्त। माझा खुंटला वचनार्थ। जिंकणें ठेला रघुनाथ। दुःखाभिभूत इंद्रजित ॥८३॥ न जिंकवे रघुकुळ टिळक। इंद्रजितासीं परम दुःख। विलपतसे अधोमुख। करी महाशंख अति दुःखें ॥८४॥

श्रीरामांची प्रतिक्रिया व वाग्देवतेची सुटका : तें जाणोनि श्रीरघुनाथ। म्हणे इंद्रजिताचा

शब्दार्थ : १. रक्तचंदनाच्या लाकडांनी, २. धूररहित, ३. घुबडाच्या रक्ताने, ४. यज्ञकुंडाभोवती उदक शिंपण;, ५. यज्ञकुंडाभोवती दर्भ पसरणे, ६. शिंपडी, ७. पोलाद, ८. एक लाकडी यज्ञपात्र, ९. बोकडाचे रक्त, १०. अति उग्र

पुरुषार्थ। केंवी बांधील शरबंधात। तोही युद्धार्थ पाहूं पां ॥८५॥ स्वयें विचारी श्रीरघुनाथ। मी तंव जन्ममरणातीत। सौमित्र मरणेंसीं अलिप्त। शरबंधार्थभय काय ॥८६॥ शिववरद इंद्रजितासीं। मिथ्या न करीं मी शिवासी। अंगीं साहेन शरबंधासी। शिववरदासीं सत्यत्वा ॥८७॥ माझा गेलियाही प्राण। मिथ्या न करीं शिववरदान। शरबंधाचें भय कोण। साहतां कठिण मज नाहीं ॥८८॥ प्राकृतीं[१] भ्यावें शरबंधासी। त्याचें भय काय आम्हांसीं। सत्य करीन शिववरदासी। शरबंधासी साहोनी ॥८९॥ ऐसें विचारोनि तत्वतां। राम वाग्देवतेची देवता। इंद्रजिताच्या वचनार्था। निर्मुक्तता श्रीरामें ॥९०॥

परिणामी अग्निरथाविष्कार : वाचा होतांचि निर्मुक्त। इंद्रजित जाला हर्षयुक्त। मंत्र आणि मंत्रबीजार्थ। हृदयीं समस्त प्रकटले ॥९१॥ कृष्णछागाचें[२] घेवोनि रक्त। उग्रमंत्रीं मंत्रबीजार्थ। होम करितां विध्युक्त। साश्व रथ प्रकटला ॥९२॥ रथ देखतां सामग्रीसीं। अति उल्लास इंद्रजितासीं। युद्ध करावया श्रीरामासीं। अति आवेशीं चालला ॥९३॥

आरुरोह रथं श्रेष्ठमंतर्धानचरं शुभम् । अवध्यवाजिभिर्युक्तं शस्त्रैश्च विविधैर्युतम् ॥२४॥
समारोपितनेपथ्यं शस्त्रशक्तिसमन्वितम् । भलैस्तथार्धवन्द्रैश्च तूणीरैः समुपस्थितम् ॥२५॥
जाज्वल्यमानं वपुषा तपनीयविभूषितम् । जांबूनदमयो नागस्तरुणादित्यसन्निभः ॥२६॥
बभूवेंद्रजितः केतौ वैडूर्यसमलंकृता ॥२७॥

रथ होमीं नाहीं प्रकटला। कैंचा कैसा कोठून आला। मेघनादें[३] नाहीं लक्षिला। अवचट आला अभंग ॥९४॥ अभंग रथ अवध्य वारू[४]। वरी दिव्यास्त्रसंभारू[५]। ऐसा देखोनि रहंवरू[६]। रावणकुमरू उल्लासे ॥९५॥ रथीं शस्त्रांचा संभार। शतघ्नी शक्ती सहस्र। भाले परिघ चंद्रार्ध शर। बाण तूणीर शूळशक्ति ॥९६॥ ऐशी शस्त्रास्त्रांची संपत्ती। जिये रथीं असे पुरती। त्यासी नेपथ्य म्हणती। शास्त्रप्रयुक्तीं अभिधान ॥९७॥ ऐसा देखोनियां रथ। इंद्रजित करी होम समाप्त। रथीं बैसला उल्हासित। हर्षान्वित तेजस्वी ॥९८॥ सुवर्णाभरणीं सुशोभित। रथीं झळकत गजेंद्रकेत। तोही वैडूर्यसालंकृत। रथीं शोभत अति शोभा ॥९९॥ अभिचाराचा पुरुषार्थ। साधूनि इंद्रजित उल्हासित। हाता आल्या अभंग रथ। मग गर्जत स्वानंदें ॥१००॥ अंतर्धानरथगती। नये दुजियासी अभिव्यक्ती। निरालंब मार्गाप्रती। अतर्क्य शक्ति रथवेगा ॥१॥

हुत्वाग्नौ राक्षसैमैत्रैस्ततो वचनमब्रवीत् । अद्य हत्वा वधार्हौ तो मिथ्या संजल्पतौ रणे ॥२८॥
जयं पित्रे प्रदास्यामि रावणाय मनःप्रियम् ॥२९॥
निर्वाणबाणैर्विहतं राघवं सहलक्ष्मणम् । करिष्यामि ससुग्रीवमित्युक्त्वांतरधीयत ॥३०॥

इंद्रजिताची योजना व आकाशवाणी: राक्षसविजयाचे निजमंत्र। होम करोनि अभिचार। अभंग पावलो रहंवर। विजयी सर्वत्र मी एक ॥२॥ मारीन कपिकुंजरकोटी। सुग्रीव पाडीन उठाउठीं। निर्वानर करीन सृष्टी। तरी मी हट्टी इंद्रजित ॥३॥ आतां माझ्या प्रतापापुढें। श्रीराम कायसें बापुडें। रणीं मारीन रोकडें। फोडीन हाडें सौमित्राची ॥४॥ जटाधारी वल्कलपरिधान। कपटी दोघे राम लक्ष्मण। विंधोनियां वरद बाण। घेईन प्राण दोहींचा ॥५॥ घरींचा वैरी बिभीषण। त्याचें छेदीन नाक कान। एवढा करोनि अपमान। लंकाभुवन मग देखेन ॥६॥ श्रीरामाच्या संग्रामासीं। परम आधि[७] रावणासीं। रणीं मारून त्या दोघांसी। सुखी पित्यासी करीन ॥७॥ आभिचारिकवरदवाणी। तेणें मी विजयी त्रिभुवनीं। इंद्रजित गर्जतां

शब्दार्थ : १. सामान्य जनांनी, २, काळ्या बोकडाचे, ३. इंद्रजिताने, ४. घोडे, ५. दिव्य अस्रसमुदाय, ६. रथ, ७. मानसिक व्यथा.

आल्हादोनी। आकाशवाणी तंव जाली ।।८।। शिववरदाच्या सर्पबाणीं। राम जिंतिला शरबंधनीं। परी तो तुम्हांसी मारील रणीं। दुर्धर बाणीं वर्षोनी ।।९।। श्रीरामा साह्य शंकर। रामनाम जपे निरंतर। निजसर्पाचा बाणभार। स्वयें शंकर उखळील ।।११०।। मोकळे होवोनि राम सौमित्र। वर्षोनियां दुर्धर शर। रणीं पाडिती दशशिर[1]। निशाचर निवटिती[2] ।।११।। विकट वर्षोनियां बाण। रणीं पाडील कुंभकर्ण। तुज मारील लक्ष्मण। कुळनिर्दळण श्रीरामें ।।१२।। कुमर सेनानी[3] प्रधान। इतर चतुरंगसैन्य। श्रीराम करील रणकंदन। कुळनिर्दळण श्रीरामें ।।१३।। लंकाराज्यीं बिभीषण। श्रीराम स्थापील आपण। सीता श्रीरामें सुखसंपन्न। सत्य वचन हें मानीं ।।१४।।

आकाशवाणीचा इंद्रजितावर परिणाम : ऐकोनि आकाशवाणीची मात। नळीं कांपे इंद्रजित। अंतर्धानामाजी लपत। झणीं रघुनाथ मज देखे ।।१५।। शिववरदें समर्थ। प्रत्यक्ष रथ झाला प्राप्त। आकाशवाणी मिथ्याभूत। भय कोण येथ तियेचें ।।१६।। अशरीरी आकाशवाणी। जिव्हा नाहीं तिजलागूनी। जे बोलती मिथ्या काहाणी। कोण मानी सत्यत्वें ।।१७।। शिववरदाचे सर्पबाण। वृथा न वचती जाण। बाणीं मारीन राम लक्ष्मण। वानरगणसमवेत ।।१८।। क्षणां भ्याकड क्षणां धाकड। इंद्रजितासीं अति सांकड[4]। पुढील युद्धाचा पडिपाड[5]। कथा अति गोड श्रीरामें ।।१९।। रामायणींचे गोडपण। स्वयें श्रीराम आपण। त्याचें चरित्र अति विंदान। परम पावन शिवप्रिय ।।१२०।। एका जनार्दना शरण। श्रीराम पाळी शिववरदान। साहोनियां शरबंधन। करीन कंदन राक्षसां ।।१२१।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां शरबंधहोमविधानं नाम दशमोध्यायः ।।१०।। ओंव्या ।।१२१।। श्लोक ३०।। एवं ।।१५१।।

## अध्याय अकरावा

।। श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### इंद्रजिताकडून श्रीरामांना शरबंधन

इंद्रजिताचा मांत्रिक रथ अग्नीतून बाहेर आल्यावर रणामध्ये आगमन : पूर्वप्रसंगी इंद्रजित वीर। होम करूनि अभिचार। शस्त्रें पावला रहंवर[6]। तेणें तो दुर्धर खवळला ।।१।। अभंग रथ अश्व अमर। रथीं दिव्यास्त्रसंभार। ऐसा पावोनि रहंवर। रणीं जावया निघाला ।।२।। बैसोनि तया रथावरी। अदृश्य इंद्रजित गगनांतरीं। येतां रणभूमीवरी। देखे जुंझारी नरवानर ।।३।।

स ददर्श महावीर्यस्तावुभौ रामलक्ष्मणौ । क्षिपंतौ शर जालानि कपिमध्ये व्यवस्थितौ ।।१।।
स तु वैहायसं प्राप्य रथं तौ रामलक्ष्मणौ। आचचक्ष रणे तस्मिन्विव्याध निशितैः शरैः ।।२।।
तौ तस्य शरवेगेन पतितौ भ्रातरावुभौ। गृहित्वा धनुशी व्योम्नि घोरान्मुमुचतुः शरान् ।।३।।

देखिले राम लक्ष्मण वीर। वानरभार सहपरिवार। करिती निशाचरां मार। रणीं वानर खवळोनी ।।४।।

श्रीरामांच्या शब्दवेधी बाणांच्या हल्ल्याने राक्षसांची धांदल : इंद्रजित नभीं रथस्थिती। राहोनियां अदृश्यगतीं। राम लक्ष्मण उभयमूर्तीं। शरसंपातीं विंधिले ।।५।। बाणीं वेढिले राम सौमित्र। बाणीं व्यापिलें अंबर[7]। बाण वर्षोनि दुर्धर। धरा[8] समग्र खिळियेलीं ।।६।। गगनाहून अति दुर्धर। येतां देखोनियां शर। क्षोभोनि राम सौमित्र। धनुष्य सत्वर वाहिलें ।।७।। पुढें लक्षेना

शब्दार्थ : १. रावण, २. निर्मूळ करतील, ३. सेनापती, ४. संकट, ५. प्रकार, ६. रथ. ७. आकाश, ८. पृथ्वी.

लक्ष्य जाण। कशावरी विंधावे बाण। ऐसें लक्षितां रघुनंदन। ऐके गुणगुण राक्षसांची ॥८॥ आकाशीं अदृश्यगती। इंद्रजिताची परम शक्ती। स्वयें आल्हादें अनुवादती[1]। धरूं रघुपती शरबंधें ॥९॥ राम शब्दवेधी निपुण। अचुक बाणीं अनुसंधान। शब्दानुगती विंधोनि बाण। छेदी वदन त्रक्त्याचें ॥१०॥ वीर सांगती वाढिव लाठी[2]। शब्दासवें शर उठीं। बाण भेदोनियां कंठीं। पाडी सृष्टीं राक्षसां ॥११॥ राक्षस गर्जती चवकोन[3]। गजरासवें विंधोनि बाण। शब्दवेधी रघुनंदन। करी कंदन राक्षसां ॥१२॥ बाणीं त्रासिले देतां हाक। हाकेसवे बाण असंख्य। विंधोनियां एक एक। निर्दाळीं कटक[4] शत्रूचें ॥१३॥ वीरीं वानितां आंगवण। शब्दासवें विंधोनि बाण। जिव्हा सदंत छेदून। करी कंदन राक्षसां ॥१४॥ घायवट[5] वीर कुंथतां जाण। कुंथासवें येवोनि बाण। त्यांचें कंठनाळ छेदून। करी कंदन राक्षसां ॥१५॥ उंच करूं जातां गोष्टी। बाण येवोनि भरती कंठीं। बोंबलूं जातां पैं शेवटीं। सपिच्छ ओठीं बाण भरती ॥१६॥ इंद्रजितधनुष्याचा झणाण। ऐकोनियां रघुनंदन। नादासवें विंधोनि बाण। चाप छेदून पाडिलें ॥१७॥ श्रीराम आहे शब्दवेधी। इंद्रजित जाणों सरला बुद्धी। बोलणें सांडोनि त्रिशुद्धी[6]। निःशब्दवादी राहिला ॥१८॥ कांहीं बोलतां आपण। अंगीं वाजती श्रीरामबाण। वीरीं सांडून अनुवादन। महामौन राक्षसां ॥१९॥ अदृश्यगती गुप्त गमन। तेथें येवोनि श्रीरामबाण। राक्षसांसी केलें कंदन। रघुनंदन दृढ योद्धा ॥२०॥ शब्दवेधें श्रीरामशर। येवोनियां अति दुर्धर। मारिले राक्षसांचे भार। श्रीरामचंद्र दृढ योद्धा ॥२१॥ श्रीराम आहे शब्दवेधीं। इंद्रजितें जाणोनि त्रिशुद्धी। तेणें कैसी केली बुद्धी। तोही विधी अवधारा ॥२२॥ सैन्य सेनानी प्रधान। त्यांसीं इंद्रजित सांगे आपण। येथोनि धरावें दृढ मौन। बोलतां मरण रामबाणीं ॥२३॥

नैव ज्यातलनिर्घोषो नापि नेमिखुरस्वनः। शुश्रुवे चरतस्तस्य न च रूपं स्म दृश्यते ॥४॥
संविधायांधकाराणि मायाबलसमन्वितः। दिशश्चांतर्दधे वीरो नीहारतिमिरावृतः ॥५॥
राघवौ सूर्यसंकाशौ घोरैर्दत्तवरैः शरैः। बिभेद समरे क्रुद्धः सर्वगात्रेषु रावणिः ॥६॥

**इंद्रजित राक्षसांना शब्द न करण्याची आज्ञा देतो :** अवचट वारू हिंसल्या[7] जाण। सवेग येती श्रीरामबाण। धाकें अश्वरसना[8] बांधोन। रथचक्रें पूर्ण वाजों नेदी ॥२४॥ निःशब्दवादें निशाचर। वाजों न देती अश्वांचे खुर। अंधारीं देखणा श्रीरामचंद्र। झांकी स्वशरीर धुईमाजी[9] ॥२५॥ करोनि अविद्याअभिचार। धुई उठली दुर्धर। गुडुप दाटलें कुहर[10]। इंद्रजित वीर त्यामाजी विचरे[11] ॥२६॥ जैसे अपर दिवाकर[12]। तैसे राम सौमित्र वीर। त्यांवरी इंद्रजित वर्षे शर। रामसौमित्र लक्षोनी ॥२७॥ अंधारीं दाटलें कुहर। त्यांत कपटी इंद्रजित वीर। गगनींहूनि वर्षे शर। अति दुर्धर कोपोनी ॥२८॥

तौ हन्यमानौ नाराचैर्धाराभिरिव पर्वतौ। हेमपुंखान्नरव्याघ्रौ घोरान्मुमुचतुः शरान् ॥७॥
अंतरिक्षत्वमासाद्य ते रिपुं कंकवाससः। निपेतुरुर्व्यां विशिखाः शराः शतसहस्रशः ॥८॥

**रामलक्ष्मणांच्या शब्दवेधानें राक्षसांचे निर्दालन :** लक्ष्मण आणि रघुनाथ। निशाचरें विंधिले अत्यद्‌भुत। धारावर्शी[13] जैसे पर्वत। तैसे बाणांत झाकोळले ॥२९॥ देखोनि शत्रूची शरवृष्टी। लक्ष्मण वीर जगजेठी। धनुष्य सज्जोनि निजमुष्टी। सावधदृष्टीं विंधित ॥३०॥ श्रीराम नित्यसावधान। येतां इंद्रजिताचे बाण। निजबाणीं ते छेदून। पाडिलें पूर्ण दुखंडी ॥३१॥ एक दोन पांच सात। शत सहस्र असंख्यात। बाण छेदिले समस्त। सूक्ष्मलक्ष्यार्थें श्रीरामें ॥३२॥

शब्दार्थ : १. बोलू लागले, २. मोठी, ३. घाबरून, ४. सैन्य, ५. जखमी, ६. खरोखर, ७. खिंकाळल्यास, ८. घोड्यांच्या लगामी, ९. धुक्यामध्ये, १०. पोकळी, ११. फिरे, १२. सूर्य, १३. पर्जन्यवृष्टीने.

धन्य धनुर्वाडा[1] श्रीरामराणा। सूक्ष्मदृष्टीचा देखणा। लक्षून इंद्रजिताच्या बाणां। छेदोनि जाणा पाडिलें ॥३३॥ अभिचाराचे वरद शर। रामें छेदिले समग्र। इंद्रजित म्हणे मर मर। रणीं रघुवीर नाटोपे ॥३४॥ रणीं जिंकावया रघुपती। इंद्रजित जावोनि शिवाप्रती। सर्पबाण शिववरदोक्ती। शीघ्रगती आणिले ॥३५॥

पन्नगैस्तु शरोद्भूतै रावणिः प्रहसन्नणे । अतिमात्रशरौघेन पीडयामास राघवौ ॥९॥
तानिषून्पततो भल्लैरनेकैर्निचकर्ततुः। तेन विद्धाश्च हरयो निहताश्च गतासवः ॥१०॥
राघवार्थे परिक्रांता धरण्यामुपशेरते। लक्ष्मणस्तु सुसंक्रुद्धः क्रोधाददद्भुतमब्रवीत् ॥११॥
ब्राह्ममस्त्रं प्रयोक्ष्यामि वधार्थे सर्वरक्षसाम् ॥१२॥

सर्प जे कां शिवभूषण। तेचि स्वयें होवोनि बाण। करावया श्रीरामा शरबंधन। विंधी गर्जोन इंद्रजित ॥३६॥

रामाचा शिववरद बाणांना मान देण्याचा संकल्प : शिवाचे शिववरद बाण। त्यांसी राम न करी निवारण। मिथ्या होऊं नेदी शिववचन। निजांगें बाण खडतरतां[2] ॥३७॥ जीव जाईल तरी जावो। परी शिववचन मिथ्या न होवो। ऐसा श्रीरामाचा भावो। बाणवर्षाव स्वयें साहे ॥३८॥ वानरवीर भिडतां रणीं। मूर्च्छित पडियेले धरणीं। तेही विंधोनियां बाणीं। रामकारणीं देहत्याग ॥३९॥ श्रीरामाच्या निजकार्यार्था। वानरीं वेंचिता जीविता। अधिकाधिक उल्लासता। पाय मागुता न काढिती ॥४०॥ देह वेंचितां रामकार्यार्थी। ठाकठोक[3] ब्रह्मप्राप्ती। पळोनि जाताचि मागुती। अधोगति नरकांत ॥४१॥ पळोनि जातां ऐसें घडे। श्रीरामसेवे अंतर पडे। भुक्तिमुक्तींसीं कीर्ति उडे। नरकीं पडे आकल्प ॥४२॥ निधडी वानरांची आंगवण। श्रीरामकाजीं वेचिती प्राण। आम्हांसी नाहीं जन्ममरण। ब्रह्मप्राप्ती पूर्ण सुगमत्वें ॥४३॥ ऐसिया निर्धार सन्निष्ठी[4]। वानरवीर कोट्यानुकोटी। सुखें साहती शरवृष्टी। राम दृष्टीं लक्षोनी ॥४४॥ पडिले देखोनि वानरगण। निजअंगीं खडतरतां बाण। अति क्रोधें लक्ष्मण। श्रीरामीं आपण बोलत ॥४५॥ पडिलें आमुचे वानरगण। अंगीं भेदती दुर्धर बाण। तुजही रुपले शर दारुण। उगाचि आपण काय पाहसी ॥४६॥ मारावया राक्षसांसी। ब्रह्मास्त्र आहे मजपासीं। श्रीराम म्हणे लक्ष्मणासी। होईल जगासीं प्राणांत ॥४७॥ इंद्रजित अपराधासाठीं। मारूं नये सकळ सृष्टी। दीन जन कोट्यनुकोटी। वृद्धें धाकुटीं मरतील ॥४८॥ अंडजजरायुजादि[5] जीवांला। चराचरां भूतां सकळां। नाश होईल स्त्रियां बाळां। अस्त्रसमेळां प्रळयांत ॥४९॥ ऐसे अस्त्राचें महिमान। प्राणांतें करूं नये प्रेरण। आणिक एक माझें वचन। सावधान अवधारीं ॥५०॥ शिववरदाचे सर्पबाण। सर्वथा छेदूं नयेति आपण। मिथ्या करितां शिववचन। परम दूषण आम्हांसी ॥५१॥ आम्ही शिवाचे निजभक्त। मिथ्या करूं नये शिववरदार्थ। हाचि आमचा परमार्थ। मुख्य पुरुषार्थ या नांव ॥५२॥ विचारितां मूळन्वयीं। मज तुज दोघां मरण नाहीं। शिववरदबाण साहतां देहीं। भय कायी आम्हांसी ॥५३॥ यालागी शिववरदबाण। स्वयें साहावें शरबंधन। ऐसें सांगतां रघुनंदन। पावली खूण लक्ष्मणा ॥५४॥ प्रतिपाळावा शिववरदार्थ। दोघांचें एक हृद्गत। पुढील कथेचा कथार्थ। सावचित्त अवधारा ॥५५॥

ततस्तौ राघवौ वीरौ सर्वमर्मातिगैः शरैः। भृशमावेदयांचक्रे रावणिः समितिंजयः ॥१३॥
सरामं लक्ष्मणं चैव घोरैर्दत्तवरैः शरैः। बिभेद समरे क्रुद्धः सर्वगात्रेषु रावणिः ॥१४॥
तौ संप्रचलितौ वीरौ वेधितौ मर्मभेदिभिः। निपेततुर्महेष्वासौ जगत्यां जगतीपती ॥१५॥

शब्दार्थ : १. धनुर्धर, २. लागता, ३. ताबडतोब, ४. दृढनिश्चयाने, ५. पक्षी इत्यादीकांला.

**शिववरदाच्या बाणांचा समोरून आघात केल्याने स्वतःच्याच जीवाला धोका म्हणून इंद्रजिताचे आड्न शरसंधान :** ते काळीं इंद्रजित आपण। श्रीराम आणि लक्ष्मण। वर्मी विंधितां संपूर्ण। निःश्वासें बाण उडोनि जाती॥५७॥ इंद्रजित वर्षे जे जे बाण। श्रीरामश्वासमात्रें जाण। वाहुटळीमाजी उडे तृण। तैसे उडोन शर जाती॥५७॥ इंद्रजिताचे जे जे बाण। न करितां निवारण। श्वासमात्रें गेले उडोन। नव्हे सामान्य श्रीराम॥५८॥ म्यां विंधिले जे शर सत्राण। ज्याचें श्वासें उडती बाण। त्याचें सुटल्या शरसंधान। करील कंदन राक्षसां॥५९॥ इंद्रजित क्षोभोनि दारुण। शिववरदाचे वरद बाण। रागें घेवोनि आपण। अति सत्राण विंधिले॥६०॥ शिववरद वदे सम्यक। शरबंधनीं रघुकुळटिळक। राक्षस येतां संमुख। छेदिल मस्तक निमेषार्धें॥६१॥ शरबंधनीं सर्पबाण। करिती श्रीरामाचें स्तवन। राम शरबंधीं सावधान। सत्य जाणे इंद्रजित॥६२॥ शिववरदाचे वरद शर। तिहीं भेदिले राम सौमित्र। बाणें खिळिलें गात्रेंगात्र। प्रवाहे रुधिर[1] धरणीसीं॥६३॥ शिववरदाचें वरद बाण। अंगीं रुपतां राम लक्ष्मण। स्वयें न करिती निवारण। आंगवण असतांही॥६४॥ किंशुक[2] फुलले वसंतीं। तैसे दोघे शेंदुराकृती। अशुद्धें[3] बंबाळले शोभती। रघुपति सौमित्र॥६५॥ वर्मी भेदले वरद बाण। तेणें दोघे कंपायमान। श्रीराम आणि लक्ष्मण। मूच्छापन्न[4] ते पडिले॥६६॥

**इंद्रजिताच्या बाणांचा रामलक्ष्मणावर परिणाम :** सौमित्र आणि श्रीराममूर्ती। जगतीं पडिले जगत्पती। ते काळीं स्वयें क्षिती[5]। जाली मृद्वती पुष्पप्राय॥६७॥ अंगीं खडतरले बाण। लागती जैसे चंद्रकिरण। श्रीराम आणि लक्ष्मण। सावधान शरबंधीं॥६८॥

> पतितः प्रथमं रामः शरतल्पे निपीडितः। पुनश्च लक्ष्मणो वीरो निश्चेष्टो धरणीं गतः॥१६॥
> पश्चात्स राक्षसेंद्रो वै बबंध शरपंजरे। नालीकैरर्धनालीकैर्भल्लैर्मुक्तैः सहस्त्रशः॥१७॥
> नाराचैर्वत्सदंतैश्च सिंहदंष्टैः शितैः शरैः। तौ तु वीरौ शरैर्बद्धौ राक्षसाः कामरूपिणः॥१८॥
> युद्‌ध्यमानं न क्षमते शक्रोपि त्रिदशेवश्वरः। द्रष्टुमासादितुं वापि न शक्तः किं पुनर्युवा॥१९॥

शरबंध शरतल्पाच्या ठायीं। प्रथम राम पाडिला पाहीं। सवेंचि लक्ष्मण तोही। भूमिशायी पाडिला॥६९॥ इंद्रजित कपटी निशाचर। वरदबाणांचा शरपंजर। बांधले दोघे राम सौमित्र। गात्रेंगात्र खिळोनी॥७०॥ नाळीकसंख्या[6] अरत्निमात्र[7]। अर्धनाळीक वितस्तिशर। निकट वेधाचा पैं मार। अति दुर्धर जयाचा॥७१॥ विद्युत्प्राय[9] तेजाकार। भाळी धगधगीत वैश्वानर[10]। त्यांहीं विंधोनि अपार। राम सौमित्र बांधले॥७२॥ चांफेकळीच्या जैशा अग्रा। सगज भेदिती पाखरा। नाराच म्हणती तयां शरां। विंधिले अपार शरबंधा॥७३॥ वत्सदंतांचिया परी। ज्या भाळींसी दोनी हारी। केल्या सतेज कुसरी। ऐसिया शरीं शरबंध॥७४॥ भाळी ज्या कां अर्धचंद्रा। सिंहदंष्ट्रा अत्यंत उग्रा। शरबंधनीं श्रीरामचंद्रा। अति विचित्रा विंधिल्या॥७५॥

**रामलक्ष्मण निश्चेष्ट पडलेले पाहून इंद्रजितास हर्ष :** श्रीराम आणि लक्ष्मण। शरबंधनीं बांधोनि पूर्ण। इंद्रजित स्वयें जाण। करीत गर्जन तें ऐका॥७६॥ पायां लागती सुरगण। अमरेंद्र जो आपण। त्यासीही अलक्ष्य युद्धमहिमान। आणिला बांधोनि शरबंधें॥७७॥ माझ्या युद्धाची गुप्तगती। पावों न शके अमरपती। तुम्ही दोघे मुनष्य किती। व्यर्थ मरणार्थी आलेती॥७८॥

**लक्ष्मणाचा त्वेष :** ऐकोनि इंद्रजिताचें वचन। खवळला स्वयें लक्ष्मण। श्रीरामा पुसत आपण। शरबंधन छेदावया॥७९॥ मी तंव शेषावतार पूर्ण। निवारीन सर्पाद्‌भुतबाण। नरवानरां निर्बंधन। करीन जाण निमेषार्धें॥८०॥ देवोनियां फुत्कार। मारीन इंद्रजित

---

शब्दार्थ : १. रक्त, २. पळस, ३. रक्ताने, ४. मूर्च्छित होऊन, ५. पृथ्वी, ६. एक प्रकारचे बाण, ७. कोपराएवढे, ८. वीतीच्या प्रमाणाचे, ९. विजेससमान, १०. अग्नी.

निशाचर। बोहरी[1] करीन लंकापुर। दशशिर निवटोनी ॥८१॥ राक्षसांच्या शिरकमळीं। आजी खेळेन चेंडुफळीं। माजवीन रणकंकाळी। रणरवंदळी राक्षसां ॥८२॥ वाहती अशुद्धाचे[2] पूर। भूतें भक्षिती मांस रुधिर। तृप्त होती श्येन घार। ऐसें चरित्र करीन ॥८३॥ आज्ञा देईं श्रीरामचंद्रा। ऐसें पुसतां सौमित्रा। हांसूं आलें रघुवीरा। निजनिर्धारा[3] सांगत ॥८४॥ प्रकट करितां शेषावतार। आमहीं उच्छेदिलें वेदशास्त्र। उच्छेदिलें पुराणमात्र। अनागत[4] चरित्र उच्छेदिलें ॥८५॥ उच्छेदिली धर्मनीती। उच्छेदिली लोकस्थिती। उच्छेदिली भगवद्भक्ती। ऐसी अपख्याती होईल ॥८६॥

श्रीरामानी सांत्वन केल्यावर लक्ष्मणाचे उत्तर : बहुरूप्याचीं राव राणी। मिथ्या स्त्रीपुरुष जाणोनी। तेचि करिती संपादणी। स्त्रीपुरुषपणीं सत्यत्वें ॥८७॥ तैसेंच अवतारचरित्र। प्रतिपाळावें वेदशास्त्र। स्वधर्मलौकिकाचें सूत्र। अति तत्पर रक्षावें ॥८८॥ समूळ मूळींचें लक्षण। आम्हा दोघां नाही मरण। साहतां शिववरदाचे बाण। कठिण कोण सौमित्रा ॥८९॥ सौमित्रा एक सावधान। शिववरदाचें शरबंधन। आम्हांसी न बाधी अणुप्रमाण। सुप्रसन्न शिव आम्हां ॥९०॥ ऐकोनि श्रीराचें वचन। मस्तकीं वंदोन श्रीरामचरण। लक्ष्मण घाली लोटांगण। काय आपण अनुवादे ॥९१॥ श्रीरामा तुझी अगाध स्थिती। श्रीरामा तुझी अगाध कीर्ती। श्रीरामा तुझी अगाध शांती। तेथें मी किती जाणावया ॥९२॥ जेथें वेदां मौन पडे। शास्त्रानुवाद न चले पुढें। तुझें महिमान अगाध गाढें। केंवी मी वेडें अनुवादू ॥९३॥ राम अभिमानीं निरभिमान। सगुण वर्ततां निर्गुण। देहीं असोनि विदेहपण। राम परिपूर्ण परब्रह्म ॥९४॥ ऐसें श्रीरामस्तवन। आल्हादें अनुवादोनि पूर्ण। शरबंधीं लक्ष्मण। पडे आपण रामाज्ञा[5] ॥९५॥ लक्ष्मणाचा क्रोध अद्भुत। श्रीरामें करोनि शांत। दोघे जण शरबंधांत। पडिले दिसत निचेष्टित ॥९६॥

इंद्रजिताला हर्ष होतो : हातीं धनुष्य पाठीसीं भाते। सुवर्णपात्री बाण तेथें। पडिले देखोनि दोघांतें। इंद्रजितातें आल्हाद ॥९७॥ शरबंधीं स्वयें आपण। श्रीराम आणि लक्ष्मण। बांधलें सत्यत्वें मानून। इंद्रजितें पूर्ण वल्गिजे ॥९८॥ श्रीरामीं लागला शरबंध। इंद्रजितासी आल्हाद। निजपुरुषार्थी[6] करी अनुवाद। परमानंद जयाचा ॥९९॥ शिववरदाचें वचन। मिथ्या न करी लक्ष्मण। स्वयें सत्य मानून शरबंधन। केलें विंदान[7] तें ऐका ॥१००॥ एका जनार्दना शरण। श्रीरामा लागलें शरबंधन। शिववरदाचे सर्पबाण। रामें आपण मानूनी ॥१०१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामशरबंधनं नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ ओंव्या ॥१०१॥ श्लोक ॥१९॥ एवं ॥१२०॥

## अध्याय बारावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### सीतेला श्रीरामांचे दर्शन

रामलक्ष्मणांना शरबंदी पडलेले पाहून इंद्रजिताची वल्गना : शरबंधनीं बांधोनि रघुनाथ। इंद्रजित अतिशयें श्लाघत[8]। तेचि अर्थीचा श्लोकार्थ। स्वयें वदत तें ऐका ॥१॥

इन्द्रजित्त्वात्मनः कर्म तौ शयानौ निरिक्ष्य च। उवाच परमप्रीतो हर्षयन्सर्वनैर्ऋतान् ॥१॥
दूषणस्य च हन्तारौ खरस्य च महाबलौ। सादितौ मामकैर्बाणैर्भ्रातरौ रामलक्ष्मणौ ॥२॥

शब्दार्थ : १. नाश, २. रक्ताचे, ३. आपला निश्चय, ४. पुढील, ५. रामाज्ञेने, ६. स्वपराक्रमाचा, ७. नवलाई, ८. प्रौढी मिरवू लागला.

नैतौ मोक्षयितुं शक्यौ चैतस्मादिषुबन्धानात्। सर्वैरपि समागम्य सर्पसंघैः सुरासुरैः॥३॥
यत्कृते चिन्तयानस्य शोकार्तस्य पितुर्मम। अयं मूलमनर्थस्य सर्वेषां निहतो मया॥४॥

शरबंधीं राम लक्ष्मण। दिर्घशयन अचेतन। पडिले देखोनि दोघे जण। इंद्रजितें आपण वल्गिजे[१]॥२॥ जिहीं मारिले खर दूषण। त्रिशिऱ्याचा घेतला प्राण। चौदा सहस्र राक्षसगण। विंधोनि बाण निवटिले॥३॥ एकला श्रीराम पदाती। तेणें एवढी केली ख्याती। हें ऐकोनि लंकापती। अहोरातीं चळीं कांपे॥४॥ श्रीरामाच्या प्रतापाभेण। सदा वोसणावे[२] रावण। ते दोघे राम लक्ष्मण। शरबंधीं पूर्ण म्यां पाडिले॥५॥ अठ्ठ्यांशीं सहस्र ऋषिगण। शिव शक्र[३] चतुरानन[४]। मिळाल्या सुरासुर पूर्ण। शरबंधन सोडवेना॥६॥ माझ्या शरबंधापासून। सोडवूं शके येथें कोण। शरबंधीं राम लक्ष्मण। दोघे जण संपूर्ण मारिले॥७॥ इंद्रजित वीर जगजेठी। शरबंधाचे परिपाटीं[५]। वानरवीर कोट्यनुकोटी। रणपरिपाटीं पाडिले॥८॥ ज्यासी धाके लंकानाथ। ज्याचेनि लंकेसीं आकांत। तो म्यां मारिला रघुनाथ। वानरेंसहित सौमित्र॥९॥ राक्षसवैराचें दृढ मूळ। राम लक्ष्मण वीर प्रबळ। प्राणांत भेदोनि शरजाळ। केलें निर्मूळ वैराचें॥१०॥ राहिली रणाची आटाआटी। सरल्या युद्धाचिया गोष्टी। राम लक्ष्मण वीर जगजेठी। शरसंकटीं पाडिलें॥११॥

**विजयघोषयुक्त इंद्रजिताचा लंकेत प्रवेश :** वानरसमुदायसमवेत। रणीं जिंकिला रघुनाथ। रणीं विजयी इंद्रजित। निघे नगरांत आल्हादें॥१२॥ निजविजयाच्या भेरी। निशाणें त्राहटिल्या मोहरी। वीर गर्जती जयजयकारीं। प्रवेश नगरीं आल्हादें॥१३॥ निजविजयाच्या गजरीं। शृंगारिली लंकापुरी। गुढिया मखरें घरोघरीं। डोलती अंबरीं पताका॥१४॥ सडे चौक रंगमाळा। अति आल्हाद राक्षसकुळा। इंद्रजित[६] जेत्याचा[६] सोहळा। पहावया डोळां आल्हाद॥१५॥

स इन्द्रजिन्महामायः सर्वसैन्यसमन्वितः। प्रविवेश पुरीं लंकां जीमूतमिव भास्करः॥५॥
तत्र रावणमासीनमभिवाद्य कृतांजलिः। आचचक्षे प्रियं पित्रे निहतौ रामलक्ष्मणौ॥६॥
उत्पपात ततो हृष्टः पुत्रं च परिषस्वजे। रावणो रक्षसां मध्ये श्रुत्वा शत्रू निपातितौ॥७॥
मूर्ध्नि चैनमुपाजिघ्रन्पप्रच्छ प्रीतमानसः। प्रहसंस्तु ततस्तस्मै पित्रे वृत्तं न्यवेदयत्॥८॥
सहर्षवेगानुगतांतरात्मा श्रुत्वा गिरस्तस्य महारथस्य।
जहौ ज्वरं दाशरथेः समुत्थं प्रहृष्टवाचाभिननंद पुत्रम्॥९॥

महाकपटी इंद्रजित। सकळसैन्यासमवेत। स्वयें प्रवेशे लंकेआंत। जेंवी भास्वत[७] महाअभ्रीं[८]॥१६॥ विजयवाद्यांच्या गजरीं। छत्रें पल्लवछत्रें शिरीं। विजयमान युग्मचामरीं। लंकापुरीं प्रवेशे॥१७॥ सिंहासनीं दशानन। त्यासी करोनि अभिवंदन। सखे बंधु सुहृज्जन। प्रिय प्रधान आलिंगी॥१८॥

**इंद्रजिताचे हर्षयुक्त स्वागत :** सभे समस्तां देखतां। बैसवोनि लंकानाथा। विजयसंग्रामाची कथा। होय सांगता इंद्रजित॥१९॥ करोनि शरबंधविंदान। प्रथम पाडिला रघुनंदन। सवेंचि पाडिला लक्ष्मण। वानरगण एक एक॥२०॥ अंगद सुग्रीव जांबवंत। रणीं पाडिला हनुमंत। वानरवीर अति समर्थ। मारिले समस्त शरबंधें॥२१॥ ऐकोनि इंद्रजिताचें वचन। गर्जे रावण आल्हादोन। हरिखें[९] करोनि[१०] उत्प्लवन[१०]। दे आलिंगन पुत्रातें॥२२॥ वीस भुजीं आलिंगितां। धणी[११] न पुरे लंकानाथा। पुनःपुन्हां मुख चुंबितां। अवघ्राही[१२] माथां आल्हादें॥२३॥ अनर्घ्य

---

शब्दार्थ : १. वल्गना केली, २. स्वप्नामध्ये बडबडतो, ३. इंद्र, ४. ब्रह्मदेव, ५. प्रकारे, ६. विजयी इंद्रजिताचा, ७. सूर्य, ८. मोठ्या ढगांत, ९. आनंदाने, १०. उडी, मारून, ११. तृप्ती, १२. हुंगी.

रत्नांचा अभिषेक। निजपुत्रासीं करी दशमुख। रणीं विजयाचा हरिख। परम सुख लंकेशा॥२४॥ श्रीरामयुद्धाच्या आधीं। रावणा होती क्षयव्याधी। इंद्रजितानें ती त्रिशुद्धी। अधिव्याधी छेदिली॥२५॥ रणीं मारिले राम लक्ष्मण। ऐकोनि इंद्रजिताचे वचन। निसूर[1] जाला रावण। शत्रू संपूर्ण निमाले॥२६॥ राम लक्ष्मण सहवानरीं। रणीं मारलियावरी। वैरी मज नाहीं संसारी। निश्चय करी रावण॥२७॥ शरबंधी राम सौमित्र। पडिले देखोनि वानरवीर। रक्षावया श्रीरामचंद्र। कपिकुंजर पावले॥२८॥

तस्मिन्प्रविष्टे लंकायां कृतार्थे रावणात्मजे। ररक्षुः परिवार्याथ राघवौ प्लवगर्षभाः॥१०॥
हनूमानंगदो नीलः सुषेणः कुमुदो नलः। गजो गवाक्षः पनसः सानुप्रस्थो महाहरिः॥११॥
जांबवानृषभः सुंदो रंभः शतबलिः पृथुः। व्यूढानीकाश्च यत्ताश्च द्रुमानादाय सर्वतः॥१२॥

इंद्रजित विजयगजरा। प्रवेशला लंकापुरा। शरबंधीं श्रीरामचंद्रा। रक्षण वानरां अति यत्नें॥२९॥ शरबंधीं राम सौमित्र। संरक्षणीं वानरवीर। पावले पैं थोर थोर। परम शूर वाढिवा॥३०॥ हनुमंत अंगद आणि नीळ। सुषेण कुमुद आणि नळ। सानुप्रस्थ वीर प्रबळ। रणकल्लोळ शतबळी॥३१॥ गज गवाक्ष पनस रंभ। जांबवंत ऋषभ शरभ। पृथु वानर स्वयें सुप्रभ। सैन्यसमारंभ सज्ज केला॥३२॥ राम पाडिला शरपंजरीं। भोंवत्या वानरांच्या हारी। द्रुमपाणी[2] महावीरीं। सैन्यसंभारीं रक्षण रामा॥३३॥ राम सौमित्र शरपंजरीं। विकळ देखिले वानरीं। यालागीं मिळोनि महावीरीं। शिळाशिखरीं सन्नद्ध॥३४॥ वानरवीर श्रेष्ठ श्रेष्ठ। रामरक्षणीं अति सन्निष्ठ। वारया वाहों न शके वाट। व्यूह दुर्घट तिहीं केला॥३५॥

रामलक्ष्मणयोर्दृष्ट्वा शरीरे सायकैश्चिते। वानरेंद्रस्य संजातं सुग्रीवस्य महद्भयम्॥१३॥
तमुवाच परित्रस्तं वानरेंद्रं बिभीषणः। सबाष्पवदनं दीनं क्रोधव्याकुललोचनम्॥१४॥
अलं त्रासेन सुग्रीव बाष्पवेगो निगृह्यताम्। एवं प्रायाणि युद्धानि विजयो नास्ति नैष्ठिकः॥१५॥
सभाग्यशेषतास्माकं यदि वीर भविष्यति। मोहादेतौ विमुच्येते भ्रातरौ रामलक्ष्मणौ॥१६॥

**रामलक्ष्मण निश्चेष्ट पडल्याने सुग्रीवावर परिणाम :** शरबंधी राम सौमित्र। बाणें भेदिलीं गात्रेंगात्र। रिता ठाव नाहीं तिळमात्र। पडिले वीर निचेष्टित॥३६॥ ऐसें देखोनि दोघांसी। भय त्रास सुग्रीवासीं। अश्रु स्रवतीं[3] लोचनांसी। उकसांबुकसीं स्फुंदत॥३७॥ शरबंधाच्या बंधनीं। मुख्य धुरा निमाल्या दोनी। गुह्य बिभीषणा सांगोनी। तळमळोनी विलपत॥३८॥ सिद्धि न पवेचि कार्यार्थ। व्यर्थ गेला माझा पुरुषार्थ। रणीं निमाला श्रीरघुनाथ। विलपत अति दुःखे॥३९॥ भाक दिधली श्रीरामचरणीं। सीता आणीन बंदीपासोनी। राम निमाला शरबंधनीं। श्रीरामऋणीं मी उरलों॥४०॥ श्रीराम गेला परलोकासी। सर्वे नेलें लक्ष्मणासी। ऋण फेडावें कोणापासीं। अति दुःखेंसीं विलपत॥४१॥ रणीं मारोनि लंकेशासी। सोडवून आणिल्या सीतेसी। ते पुसेल श्रीरामासी। मुख तीपासीं काय दावूं॥४२॥ रडत पडत अति निर्दैव। म्हणाल नपुंसक सुग्रीव। राम अंतरला जीवींचा जीव। प्रताप दावूं कोणासी॥४३॥ माझ्या अंगीं अति पुरुषार्थ। क्षणें निर्दाळीन लंकानाथ। रणीं उपटीन इंद्रजित। तरी रघुनाथ न भेटे॥४४॥ रणीं निमाला श्रीरघुनाथ। ऐसा मानोनि इत्यर्थ। श्रीरामदुःखें दुःखाभिभूत। सुग्रीव प्राणांत करूं पाहे॥४५॥ श्रीरामामागें राहणें। तें तंव मज निंद्य जिणें। रामविरहें प्राण देणें। या कारणें उद्यत[4]॥४६॥ त्यासी बिभीषण संबोखित[5]। नाहीं निमाला रघुनाथ। समूळ न घेतां वृत्तांत। व्यर्थ प्राणांत कां करिसी॥४७॥ चाल पाहों शरबंधांत। श्रीराम निमाला कीं जित। समूळ घेवोनि इत्यर्थ। मग कार्यार्थ विचारूं॥४८॥

---

शब्दार्थ : १. निर्भय, २. हातात वृक्ष घेतलेले अशा, ३. गळू लागले, ४. तयार, ५. समजूत करू लागला.

एवमुक्त्वा ततस्तस्य जलक्लिन्नेन पाणिना। सुग्रीवस्य शुभे नेत्रे प्रममार्ज बिभीषणः॥१७॥
विमृज्य वदनं तस्य कपिराजस्य धीमतः। अब्रवीत्कालसंप्राप्तमसंभ्रांतमिदं वचः॥१८॥
तत्मादुत्सृज्य वैक्लव्यं सर्वकार्यविनाशनम्। हितं रामपुरोगाणां सैन्यानामुचिंतय॥१९॥
अथवा रक्ष्यतां रामौ यावत्संज्ञाविपर्ययः। लब्धसंज्ञौ हि काकुत्स्थौ भयं नौ व्यपनेष्यतः॥२०॥

बिभीषणाचें सुग्रीवास आश्वासन : सुग्रीवासी संबोखून। जलहस्तें बिभीषण। त्याचे नेत्र परिमार्जून[1]। हितवचन अनुवादे[2]॥४९॥ तूं तंव राजा वानरनाथ। तुज देखोनियां रडत पडत। इंद्रजित येवोनि त्वरित। करील घात सर्वांचा॥५०॥ श्रीरामाच्या हितकार्यार्था। प्रवर्तावें गा तत्वतां। येवों न द्यावी विकळता। संरक्षितां श्रीरामा॥५१॥ श्रीराम होईल सावधान। त्रिसत्य सत्य माझें वचन। विकल्प न धरावा आपण। ऋषिभाषण वाल्मीकी॥५२॥ सेना सैनिक प्रधान। मेळवोनि वानरगण। श्रीराम रक्षावा आपण। सावधान जंव होय॥५३॥

श्रीराम-महिमा वर्णन : सावध जाल्या रघुनाथ। करील रावणाचा घात। इंद्रजित-कुंभकर्णासमवेत। रणीं प्राणांत राक्षसां॥५४॥ राक्षसांची जाती व्यक्तीं। उरों नेदी रघुपती। सकळ भयाची समाप्ती। जाण निश्चितीं श्रीरामें॥५५॥ सुग्रीव आणि बिभीषण। ऐकोनि दोहींचें अनुवादन। अंगद झाला हास्यवदन। श्रीराममहिमान अलक्ष्य॥५६॥ श्रीरामनामाच्या स्मरणीं। जन्ममरणां समूळ पळणी। तो राम पडला शरबंधनीं। सत्य मानी तो मूर्ख॥५७॥ शस्त्रघात लागल्या स्वप्नीं। तेणें जागृतीं न मरे कोणी। तेंवी राक्षसशरबंधनीं। श्रीराम रणीं केंवी पडे॥५८॥ राम काळाचा कृतांत[3]। राम जन्ममरणातीत। राम परब्रह्म सदोदित। त्यासीं रणघात[4] केंवी घडे॥५९॥ श्रीराम जगाचें जीवन[5]। राम सर्वांगे चैतन्यघन। राम शस्त्राचें तिखटपण। त्यासी लागती बाण हे क़दा न घडे॥६०॥ राम अवतारी ब्रह्म पूर्ण। त्यासीं नाहीं जन्ममरण। त्याचें अंगीं लागोनि बाण। पावला निधन[6] तें मिथ्या॥६१॥ राम चैतन्यविग्रही[7]। राम देहींच विदेही। श्रीरामासीं द्वंद्वबाधा नाहीं। पडिला घायीं तें मिथ्या॥६२॥ करितां रामनाम स्मरण। मरणासीं ये अलोट मरण। त्या श्रीरामा लागोनि बाण। निमाला पूर्ण ते मिथ्या॥६३॥ शरबंधनीं रघुनंदन। चित्स्वरूपें सावधान। राम बंधनीं निर्बंधन। हें मुख्य लक्ष्मण रामाचें॥६४॥ राम शरबंधनीं बंधातीत। तरी कां पडोन राहिला येथ। त्याही अर्थीचा वृत्तांत। सावचित्त अवधारा॥६५॥

हनुमंत आणि अंगदाचा संवाद : शिववरदाचे वरद बाण। मिथ्या न करी रघुनंदन। स्वयें साहोनि शरबंधन। शिववरदान प्रतिपाळी॥६६॥ ऐसी श्रीरामाची मूळकथा। अंगदी सांगे आल्हादता। तेणें उल्हास हनुमंता। सप्रेमता आलिंगी॥६७॥ परम प्रीतीं पाठी थापटी। श्रीरामस्वरूपकसवटी। अंगदाची गोड गोष्टी। सकळां पोटीं आल्हाद॥६८॥ श्रीरामासीं नाहीं मरणावस्था। श्रीरामीं नाहीं विकळता। कोण पाड[8] इंद्रजिता। मज हनुमंता असतांही॥६९॥ ऐकोनि हनुमंतउत्तर। उल्लासले स्वयें वानर। अवघे करिती जयजयकार। हर्षें निर्भर सुग्रीव॥७०॥ येरीकडे स्वयें रावण। सीता वश करावया आपण। रणीं निमाले राम लक्ष्मण। साक्षेपें[9] श्रवण स्वयें करवी॥७१॥

राक्षस्यस्त्रिजटा चापि शासनात्तमुपस्थिताः। ता उवाच ततो हृष्टो राक्षसी राक्षसेश्वरः॥२१॥
हताविंद्रजिताख्यातौ वैदेह्या रामलक्ष्मणौ। पुष्पकं तां समारोप्य दर्शयध्वं रणे हतौ॥२२॥
यस्याश्रयादवष्टब्धा सीता मां नोपतिष्ठते। सोऽस्या भर्ता सह भ्रात्रा निहतो रणमूर्धनि॥२३॥

रावण सीतेला विमानातून रामलक्ष्मणांची स्थिती दाखवितो : त्रिजटा वृद्ध राक्षसी। साक्षेपें

---

शब्दार्थ : १. पुसून, २. बोलू लागला, ३. विनाशक, ४. युद्धात नाश, ५. आधार, ६. मृत्यू, ७. ज्ञानस्वरूपी, ८. पर्वा
९. प्रयत्नाने.

पाचारोनि तिसी। रावण सांगे तियेसी। अति उल्लासीं गर्जोनी॥७२॥ इंद्रजितानें करोनि रण। रणीं मारिले राम लक्ष्मण। ऐसे सीतेसी सांगोनि आपण। करवीं दर्शन दोहींचें॥७३॥ सीता पुष्पकीं[१] वाहोनि जाण। तिसी दाखवीं रणांगण। जेथें पडले राम लक्ष्मण। विंधोन बाण शरबंधीं॥७४॥ श्रीरामबळें तत्त्वतां। मज दृष्टी नाणी सीता। त्या मारिलें रघुनाथा। सहित भ्राता सौमित्र॥७५॥ रणीं मारिलें रघुकुळटिळका। सीते सांडोनि समूळ शंका। उल्लासें वरी लंकानाथा। सकळ सुखा पावसी॥७६॥

विमानं पुष्पकं शनैरारोपयन्शुभम् । रावणः कारयन्लंकां पताकाध्वजमालिनीम्॥२४॥
घोषयामास च तदा स्वपुर्यां राक्षसेश्वरः। हताविंद्रजितां संख्ये तावुभौ रामलक्ष्मणौ॥२५॥
विमानेन तु सा सीता तदा त्रिजटया सह । ददर्श वानराणां तु सर्वसैन्यं निपातितम्॥२६॥
ततः सीता ददर्शोभौ शयनौ शरतल्पगौ। लक्ष्मणं चैव रामं च विसंज्ञौ शरपीडितौ॥२७॥
तौ दृष्ट्वा भ्रातरौ तत्र शोकबाष्प समाकुला। वेपंती दुःखिता सीता करुणं विललाप ह॥२८॥

सीता वाहोनि विमानीं। त्रिजटा निघाली घेवोनी। तंव रावण लंकाभुवनी। गुढिया उभवोनि हरिखेजे॥७७॥ इंद्रजितानें विंधोनि बाण। रणीं पाडिले राम लक्ष्मण। भेरी त्राहाटिल्या निशाण। गडगर्जन लंकेसीं॥७८॥ राम मारिला निशाचरीं। अनुवादती नरनारी। वानरांच्या मारिल्या हारी। बहु बाणाग्रीं विंधोनी॥७९॥ वानरांचें निवासस्थान[२]। देखिलें चालतां विमान। रणीं पडिले राम लक्ष्मण। रणांगण देखिलें॥८०॥

श्रीराम सुरक्षित असल्याची सीतेची खात्री : श्रीराम आणि सौमित्र। पडिले क्षितितळीं[३] महावीर। बाणीं भेदलें गात्रेंगात्र। प्रवाहे रुधिर सर्वांगीं॥८१॥ देखोनि श्रीरामदर्शन। सीता हरिखली संपूर्ण। धन्य धन्य रावणच्छळण। श्रीरामनिधान[४] देखिलें॥८२॥ रावणाचा कृतोपकार। हा मज आजि घडला थोर। स्वयें भेटविला श्रीरामचंद्र। दशशिर कृपाळु॥८३॥ विमानींहून आपण। हरिखें घाली लोटांगण। देखतां श्रीराम लक्ष्मण। सुख संपूर्ण सीतेसीं॥८४॥ देखोनि श्रीरामावस्था। अवघें मिथ्या मानी सीता। राक्षसमाव हे तत्वतां। मृत्यु रघुनाथा असेना॥८५॥ ऐकतां रामनामगजर। मृत्यु पळे अति स्तवर। न येववे रामनामासमोर। श्रीरामचंद्र न मारवे॥८६॥ राम काळाचा आकळिता। त्यासीं नाहीं मरणावस्था। रणीं मारिलें रघुनाथा। मिथ्या वार्ता मायिक॥८७॥ श्रीराम शस्त्राची निजशक्ती। श्रीराम गतीची निजगती। श्रीराम जगदात्मा त्रिजगतीं। शस्त्रसंपातासीं[५] अलिप्त॥८८॥ शस्त्रें छेदितां आकाशासी। शस्त्रें वृथा जाती आपैसीं। तैसीच गति श्रीरामासी। शस्त्रघातासीं अलिप्त॥८९॥ श्रीराम निजांगें आपण। सकळ शस्त्रांचें तिखटपण। त्याच्या अंगीं रुपले बाण। वृथा विंदान मायिक॥९०॥ श्रीरामाच्या स्वस्वरूपासीं। ठाव नाहीं जन्ममृत्यूंसी। त्या मारिलें श्रीरामासीं। वृथा राक्षसी अनुवाद॥९१॥ निजनिश्चयें तत्वतां। मरण नाहीं श्रीरघुनाथा। येणें निश्चयें असतां सीता। न बाधे व्यथा अणुमात्र॥९२॥

बाह्यदर्शनी सीतेचा विलाप : श्रीराम शिव सीता शक्ती। येरयेरांच्या जाणती गती। तेही लोकरक्षणार्थी। असे विलपती तें ऐका॥९३॥ माझ्या सर्वांगीं शुभलक्षण। मज न यावें वैधव्यपण। रणीं मारिल्या रघुनंदन। अवलक्षण लक्षणें॥९४॥ हातीं पद्म पायीं पद्म। टाळुमस्तकीं सौभाग्यपद्म। रणीं मारिल्या श्रीराम। पद्में अपद्म मज माझीं॥९५॥ निजलक्षणें

शब्दार्थ : १. पुष्पकनामक विमानांत, २. राहण्याची जागा, ३. पृथ्वीवर, ४. रामरूपी मोठा ठेवा.
५. शस्त्राच्या आघाताला.

सीता सती। स्वयें असे अनुवादती। अति दुःखें विलपती। श्रीरघुपतिवियोगें ॥९६॥ सौभाग्यवती तूं संपूर्ण। वसिष्ठाचें आशीर्वचन। मिथ्या जालें त्याचें ज्ञान। रघुनंदन निमाल्या ॥९७॥ मजसीं श्रीरामा अभिषिंचन[१]। ऐसें अगस्तीचें वचन। त्याचेंही मिथ्या झालें ज्ञान। रघुनंदन निमाल्या ॥९८॥ अनसूया पतिव्रता पूर्ण। निजसौभाग्य अर्पी आपण। तिचेंही उडालें सतीपण। रघुनंदन निमाल्या ॥९९॥ अरुंधती श्रेष्ठ नारी। तिणें मज दिधली गळसरी। श्रीराम निमालियावरी। तिचीही थोरी अति मिथ्या ॥१००॥ विश्वामित्र वरद परम। नित्य सीतासौभाग्यसंभ्रम[२]। त्याचाही मिथ्या वचनधर्म। रणीं श्रीराम निमाल्या ॥१॥ हा राम हा लक्ष्मण। दीर्घ स्वरें करीं रुदन। दिव्यास्त्र असतां पूर्ण। सर्वांगीं बाण वेधले कैसे ॥२॥ सर्वांगीं खडतरोनि[३] बाण। क्षितीं[४] लोळती राम लक्ष्मण। सीता आक्रंदें करोनि रुदन। काय आपण अनुवादे ॥३॥ रणीं निमाल्या राम लक्ष्मण। निःशंक मज गांजील रावण। मीही आतांच सांडीन प्राण। कांस संपूर्ण घातली ॥४॥ घालोनियां वज्रासन। अर्धोन्मीलित करोनि नयन। सबाह्य श्रीराम चिंतून। त्यजावया प्राण उदित ॥५॥

सीतेचे त्रिजटेकडून सांत्वनः तंव त्रिजटा म्हणे सीतेसी। तूं काय जालीस परम पिसी[५]। स्वस्थ असतां श्रीरामासीं। तूं कां त्याजिसी निजप्राण ॥६॥

> परिदेवयतीं सीतां राक्षसी त्रिजटाब्रवीत् । मा विषादं कृथा देवि भर्तायं तव जीवति ॥२९॥
> कारणानि तु वक्ष्यामि महांति सदृशानि च । नैतौ शक्यौ रणे जेतूमपि सर्वैः सुरासुरैः ॥३०॥
> इदं विमानं वैदेहि पुष्पकं नाम नामतः। दिव्यं न धारयेत्त्वां हि यदि रामो हतो भवेत् ॥३१॥
> त्यज शोकं च दैन्यं च दुःखं च जनकात्मजे। रामलक्ष्मणयोरर्थे नैतौ शूरौ विजवितौ ॥३२॥

ऐकोनि सीतेचें रुदन। देखोनि प्राणांत निर्वाण[६]। त्रिजटा बोले आपण। सीते सावधान अवधारीं ॥७॥ नाहीं निमाले राम लक्ष्मण। हें माझें सत्य भाषण। शरबंधीं सावधान। दोघे जण निजबोधें ॥८॥ दिव्यास्त्रे असतीं त्यांपाशीं। केंवी सांपडती शरबंधासीं। त्याही समूळ कारणांसी। ऐक तुजपासीं सांगेन ॥९॥ इंद्रजितें करोनि अभिचार[७]। प्रसन्न करोनि श्रीशंकर। शिववरदाचे सर्पशर। अति अनिवार मागीतले ॥११०॥ शिववरद सम्यक। जातां श्रीरामासंमुख। तो तुझें छेदील मस्तक। अंधारीं लागे अतर्क्य शरबंध ॥११॥ माझ्या वरदबाणांस्तव आपण। शरबंधीं पडती दोघे जण। तुज संमुख गेलिया जाण। घेतील प्राण निमेषार्धें ॥१२॥ शरबंधीं राम सौमित्र। सावधानत्वें निधडे शर। संमुख आल्या निशाचर। छेदिती शिर निमेषार्धें ॥१३॥ ऐसिया शिववरदाभेणें। कदा संमुख न ये रावण। इंद्रजित स्वयें नये आपण। राक्षसगण न येती ॥१४॥ सप्त प्रहर जाल्यापाठीं। सुटती शरबंधाच्या गांठी। दोघे उठती कडकडाटीं। राम जगजेठी अनिवार्य ॥१५॥ आणीक आहे गुह्य गोष्टी। गरुड येईल श्रीरामभेटी। शरसर्प पळती उठाउठीं[८]। दोघे जगजेठी निर्मुक्त ॥१६॥ असत्य न वदे माझें वदन। पूर्वी विटाळलें नाहीं जाण। पुढें न बोलें असत्य वचन। सत्य भाषण हें माझें ॥१७॥

त्रिजटेने सांगितलेली विशिष्ट खूण : सीतासतीचे संगतीं। त्रिजटेसीं ज्ञानस्फूर्ती। दृष्टीं देखिल्या रघुपती। विज्ञानस्थिति ठसावे ॥१८॥ आणीक प्रत्यक्ष दृष्टांत। विधवास्पर्शें विमान पतित। हें तंव घडलें नाहीं येथ। तूं सौभाग्यवती श्रीरामें ॥१९॥ निमाला असता रघुनाथ। तरी हें विमान होतें पतित। तूं सौभाग्यभाग्यवंत। स्वस्थ रघुनाथ शरबंधीं ॥१२०॥ ज्यासीं स्वभावें

---

शब्दार्थ : १. राज्याभिषेक, २. सीतासौभाग्याबद्दल उद्योग, ३. लागून, ४. जमिनीवर, ५. वेडी, ६. निश्चय, ७. शाबरी विद्याप्रयोग, ८. तत्काल

विमान प्राप्त। तो त्रैलोक्यीं होय समर्थ। तें विमान देत लंकानाथ। तूं सौभाग्यवंत भाग्याची॥२१॥ दाटून प्राप्त होय विमान। या भाग्याचें निजमहिमान। येथें गणूं शके कोण। तूं भाग्यपूर्ण श्रीरामें॥२२॥ शरपंजरीं श्रीराम स्वस्थ। सत्य मानून वचनार्थ। शोक दैन्य दुःखार्थ। सांडीं समस्त जानकीये॥२३॥ संरक्षणाचे अनुवृत्ती[1]। त्रिजटेसीं सीतासंगती। तेणें पावली ज्ञानस्फूर्ती। धन्य संगती संतांची॥२४॥ त्रिजटा केवळ सत्वमूर्ती। नाहीं असत्याची अनुवृत्ती। तेणें फळली संतसंगती। ज्ञानस्थितीं अनुवादे॥२५॥

श्रुत्वा च वचनं तस्याः सीता सुरसुतोपमा। कृतांजलिरुवाचेमामेवमस्त्विति मैथिली॥३३॥
विमानं पुष्पकं तच्च सन्निवर्त्य मनोजवम्। दीना त्रिजटया सीता लंकां भूयः प्रवेशिता॥३४॥
ततस्त्रिजटया सार्द्धं पुष्पकादवतीर्य सा। अशोकवनिकामेव राक्षसीभिः प्रवेशिता॥३५॥

स्वस्थ श्रीराम लक्ष्मण। ऐकोनि त्रिजटेचें वचन। सीता जाहली सुप्रसन्न। स्वानंदें पूर्ण अनुवादे॥२६॥

विशिष्ट खूण ऐकून सीतेची प्रतिक्रिया : जें अनुवादलीसी[2] साजणी। तथास्तु[3] हो[3] तुझी वाणी। ऐसें सीता अनुवदोनी। श्रीरामदर्शनीं सादर॥२७॥ परतवितां विमान। श्रीरामाचें दूर दर्शन। सीता पाहे सावधान। प्रत्यंगीं मन न्यासूनी[4]॥२८॥ ठाणमाणगुणलक्षण। सबाह्य श्रीरामलक्ष्मण। सीता निरखी आपण। सावधान पतिरुपीं॥२९॥ सबाह्य श्रीराम मूर्च्छापन्न अंतरीं स्वयें सावधान। बाह्य अर्धोन्मीलित नयन। देखणा[5] पूर्ण सर्वांगें॥१३०॥ बाह्य श्रीरामा शरबंधन। अंतरीं बंधमोक्षविहीन। बाह्य रुधिरोक्षित[6] मलक्लिन्न[7]। अंतरीं निर्मळ निर्गुणत्वें॥३१॥ बाह्य विकळता[8] रघुपती। अंतरी सावध सर्वां भूतीं। बाह्य पडला दिसतो क्षितीं[9]। गुणतीतीं विश्रांत॥३२॥ लक्षितां श्रीरामठाणमाण। वेदशास्त्रां पडे मौन। माजीं हरपे गगन गहन। त्याचेंही महिमान कोण वर्णी॥३३॥

सीतेची प्रसन्नता : ऐसें देखोनि रघुनाथा। आपआपणा विसरे सीता। सबाह्य कोंदली स्वरूपता। पतिपरमार्था देखोनी॥३४॥ छळूं[10] जातां स्वयें रावण। छळणीं श्रीराम सुप्रसन्न। देखोनि निजात्मदर्शन। सुखसंपन्न मज केलें॥३५॥ रावण म्हणों नये कपटी। जेणें श्रीरामेंसी करोनि भेटी। निवविलें[11] सुख[11]संतुष्टीं। उपकार कोटी मज त्याचा॥३६॥ स्वप्नीं नायकें श्रीरामगोष्टी। तो प्रत्यक्ष दाविला दृष्टी। रावण म्हणों नये कपटी। सुखसंतुष्टीं निवविलें॥३७॥ यापरी दावोनि रणांगण। भेटवोनि श्रीराम लक्ष्मणं। त्रिजटा परतली आपण। घेवोनि विमान सीतेसीं॥३८॥ शोक नाहीं सीतेच्या मनीं। यालागीं पावली अशोकस्थानीं। सुखसंपन्न निजबंधनीं। श्रीरामपत्नी सुखरूप॥३९॥ उल्लंघोनि लंकाभुवन। ठाकोनि आली अशोकवन। तेथें खेचोनि विमान। ठेवी आपण सीतेसीं॥१४०॥ छळण करितां रावण। छळणीं सीता सुप्रसन्न। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥४१॥ श्रीरामा करितां शरबंधन। राम शरबंधीं सुप्रसन्न। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥४२॥ रावणें करितां अति बंधन। श्रीराम सीता सुप्रसन्न। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥४३॥ श्रीरामसीतादर्शन। देखतां दोघे सुप्रसन्न। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥१४४॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां जानकीश्रीरामदर्शनं नाम द्वादशोऽध्यायः॥१२॥ ओंव्या॥१४४॥ श्लोक॥३५॥ एवं॥ १७९॥

---

शब्दार्थ : १. संबंधाने, २. बोलली, ३. खरी ठरो, ४. ठेवून, ५. सुंदर ६. रक्ताने माखलेला, ७. मळाने भिजलेला, ८. मूर्च्छा, ९. जमिनीवर, १०. कपटाने फसविण्याला, ११. सौख्य देऊन आनंदविले.

# अध्याय तेरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## श्रीरामांची शरबंधनातून मुक्तता

सीता अशोकवनात परतल्यावर श्रीराम शरबंधानातून शुद्धीवर आले व लक्ष्मणाची अचेतन स्थिती पाहून विलाप करू लागले : सीता नेलिया अशोकवना। मागें शरबंधीं रघुनंदना। पावोनि[1] लब्धचेतना[1]। आपआपणा अवलोकी॥१॥

अथ दीर्घेण कालेन संज्ञां लेभे नरोत्तमः । प्रत्यवेक्षत चात्मानं शोणितेन परिप्लुतम् ॥१॥
अदीनो दीनया वाचा रामः परमसत्ववान् । अभ्यभाषत दीनात्मा हरिभिः परिवारितः॥२॥
लक्ष्मणं पतितं दृष्ट्वा दुःखशोकसमान्वितः। विललाप ततो रामो मंदभश्रूण्यवर्जयन् ॥३॥
किं नु मे सीतया कार्यं लब्धया जीवितेन वा। शयानं योऽद्य पश्यामि लक्ष्मणं शुभलक्षणम्॥४॥
यत्र क्वचिल्लभेद्धार्यां पुत्रान्मित्रांश्च बांधवान्। न लक्ष्मणसमो भ्राता सचिवः सांपरायिकः॥५॥

शरबंधनीं रघुनंदन। स्वयें होवोनि सावधान। निजांगीं खडतरले[2] बाण। रूधिरें क्लिन्न[3] भूमिशायी[4]॥२॥ सर्वेंचि पाहे लक्ष्मण। तंव यासीं न देखे प्राण। सज्ञान घेवोनि अज्ञान। मिथ्या रुदन स्वयें दावी॥३॥ नाहीं लक्ष्मणा जीवघात। ऐसें जाणोनि श्रीरघुनाथ। पहावया वानरवृत्तांत। आक्रंदत अति दुःखें॥४॥ वाचा विकळ भ्रष्टस्वर। ऐकतां देखती वानर। रणीं पडला सखा सौमित्र। तेणें रघुवीर विलपत॥५॥ रावण इंद्रजित कुंभकर्ण। मारिल्या मज सुख कोण। सखा न भेटे लक्ष्मण । सांडीन प्राण यालागीं॥६॥

कितीही विजय मिळविले तरी लक्ष्मणाची सर नाही : करूनि राक्षसकंदन[5]। घेतलिया लंकाभुवन। सखा न भेटे लक्ष्मण। सांडीन प्राण त्यालागीं॥७॥ स्त्रिया सीतेऐशा जाण। असंख्य मिळती संपूर्ण। तैसा न मिळे सखा लक्ष्मण। सांडीन प्राण त्यालागीं॥८॥ स्त्रिया मेळविल्या मिळती। पुत्र पौत्र[6] होय संतती। सख्या लक्ष्मणाची प्राप्ती। त्रिजगतीं दुर्लभ॥९॥ प्रवेशल्या अयोध्येसी। भरतशत्रुघ्नकौसल्येसी। केंवी मुख दाखवूं सुमित्रेसी। त्यजीन प्राणांसी यालागीं॥१०॥ वना आलों दोघे जण। पुसती केउता[7] तो लक्ष्मण। तेव्हा माझें काळें वदन। त्यजीन प्राण यालागीं॥११॥ लक्ष्मणावांचून आपण। सर्वथा न करीं फळभक्षण। त्यावीण न घें मी जीवन[8]। त्यजीन प्राण यालागी॥१२॥ लक्ष्मणावांचून आपण। पदमात्र न करीं गमन। त्यालागीं त्यजीन मी प्राण। सत्य भाषण हें माझें॥१३॥ दुःख आठवलें दारुण। नयनीं आले अश्रु पूर्ण। आपुल्या कर्माचें दूषण। स्वयें आपण अनुवादे॥१४॥

अयं मिथ्या प्रलापो मे हत्वा युद्धे दशाननम्। यन्मया न कृतो राजा राक्षसानां बिभिषणः॥६॥

बिभीषणाचा विलाप : रणीं मारोनि रावण। राक्षसराजा बिभीषण। माझेनि न करवेचि जाण। शेकलें ऋण मज त्याचें॥१५॥ परम माझें मज दूषण। लंका बिभीषणा दिधली दान। तें मी नव्हेंचि उत्तीर्ण[9]। शेकलें ऋण मज त्याचें॥१६॥ भरतासीं पत्र देतां जाण। तेणें रणीं विंधोनि रावण। राजा करील बिभीषण। ऋण उत्तीर्ण त्याचेनि॥१७॥ आमची ऐकून मरणावस्था। भरत शत्रुघ्न तिघीं माता। प्राण देतील तत्त्वतां। उत्तीर्णता नव्हे तेणें॥१८॥ अंतकाळींचें जें ऋण। वंदून बिभीषणाचे चरण। त्यासी देवोनि धनुष्यबाण। ऋणउत्तीर्ण मी होईन॥१९॥ दिव्यास्त्रेंसीं धुनष्यबाण। माझे पावल्या बिभीषण। त्रैलोक्यीं पूज्य होईल

शब्दार्थ : १. सावध होऊन, २. लागले, ३. भिजलेला, ४. जमिनीवर पडलेला, ५. राक्षसांना मारणे, ६. नातू, ७. कोठे कोणीकडे, ८. पाणी, ९. सुटलेला, मुक्त.

पूर्ण। निजवरदान हें माझें ॥२०॥ ऐकोनि श्रीरामवचन। बिभीषण मूर्च्छापन्न। स्वयें दीर्घ करी रुदन। अभाग्य पूर्ण मज माझें ॥२१॥ बुद्धि सांगे रघुनंदन। आम्हा दोघांचा गेल्या प्राण। गजरें येवोनि रावण। करील कंदन[१] वानरां ॥२२॥ मजसंमुख करोनि रण। वानर मारतील रक्षोगण[२]। मागें तुम्हांसी न यावें मरण। शीघ्र गमन तुम्ही करा ॥२३॥ जुत्पती[३] वीर वानरगण। त्यांसी माझें लोटांगण। सवेग न येतां रावण। शीघ्र गमन तुम्ही करा ॥२४॥ मजपुढें करोनि रण। वीर मारिले रक्षोगण। जालेती सर्वस्वें उत्तीर्ण। शीघ्र गमन करावें ॥२५॥

अस्मिन्मुहूर्ते सुग्रीव प्रतियातुमिहार्हसि । सत्वहीनं हि मां राजा रावणोऽभिद्रविष्यति ॥७॥

अंगदं तु पुरस्कृत्य ससैन्यं ससुहृद्गणम् । सागरं तर सुग्रीवा पुनस्तेनैव सेतुना ॥८॥

**श्रीरामांचा सुग्रीवास ससैन्य परतण्याचा आदेश :** सुग्रीवा बुद्धि ऐक पां खरी। येचि समर्यींचे अवसरीं। जंव पडली आहे अंधारी[४]। सहपरिवारीं निघावें ॥२६॥ वानरवीर सुहृज्जन। सैन्य सेनानी कपिगण। एकवटोनि आपण। करावें गमन किष्किंधे ॥२७॥ वानरवीरांसमवेत। सुग्रीवराजा जीवें जीत। ऐकोनि येऊनि लंकानाथ। करावया घात वानरां ॥२८॥ वानरराजा तूं कपिपती। तुजवीण वानर न चालती। तुवां निघावें शीघ्रगतीं। किष्किंधेप्रति नेमस्त ॥२९॥ अंगदें आणिलें मुकुटासी। तो राग पोटीं रावणासी। पुढें घालोनियां त्यासी। सकळ सैन्येंसीं[५] निघावें ॥३०॥ करोनि आलों सेतुबंधन। तेणें मार्गें गा आपण। शीघ्र करावें गमन। किष्किंधाभुवन ठाकोनी ॥३१॥ ऐकोनि श्रीरामवचन। सुग्रीव न ढळे अणुप्रमाण। पुढती बोले रघुनंदन। शीघ्र गमन करीं बापा ॥३२॥

यत्तु कार्यं वयस्येन सुहृदा वा परं मम । कृतं सुग्रीव सत्सर्वं भवता धर्मभीरुणा ॥९॥

मित्रकार्यं कृतमिदं भवद्भिर्वानरर्षभाः । अनुज्ञाता मया सर्वे यथेष्ट गंतुमहर्थ ॥१०॥

शुश्रुवुस्तस्य ये सर्वे वानराः परिदेवितम् । ते सर्वे चक्रुरश्रुणि नेत्रैः कृष्णेतरेक्षणाः ॥११॥

आमुचें तुमचें सख्यत्व परम । त्या सख्यत्वाचें कृतकर्म। तुवां संपादिलें सुगम[६]। आत्माराम मी जाणें ॥३३॥ मित्रकार्यीं तूं विख्यात। संपादिला मित्रकार्यार्थ। सुखी केला हा रघुनाथ। परम आप्त तुम्ही मज ॥३४॥ असंख्य मेळवोनियां दळ[७]। महावीर कपि प्रबळ। सेतु बांधोनि तत्काळ । आलेति सकळ मत्कार्या ॥३५॥ सखया सुग्रीवा परियेसीं। वानर कष्टले परदेशीं। यांसी नेवोनि स्वगृहांसी। स्त्रीपुत्रांसीं भेटवीं ॥३६॥ तुवांही किष्किंधाभुवनीं। तारा रुमा दोन्ही पत्नी। सुख भोगावें अनुदिनीं। सिंहासनीं स्वानंदें ॥३७॥ अंगद युवराजा जाण। वीर शूर सुभट पूर्ण। त्याचेही लळे पाळून। सुखी संपूर्ण करावें ॥३८॥ माझिया कार्यालागीं जाण। वानरीं वेंचिले आपुले प्राण। समस्तां माझें लोटांगण। शीघ्र गमन करावें ॥३९॥ तुम्ही शीघ्र न करितां गमन। येथें येवोनि दशानन। करील वानरां रणकंदन। दुःख दारुण तें मज ॥४०॥ मज न बाधी माझी दुःखावस्था। परी सुग्रीवाची परम चिंता। दुःख न होतां कपी समस्तां। शीघ्रगमनता निघावें ॥४१॥ लक्ष्मणाच्या दुःखावस्था। मी प्राण त्यागीन आतां। प्राण त्यागील स्वयें सीता। यालागीं शीघ्रता तुम्ही जावें ॥४२॥ ऐसें श्रीरामाचें विलपन[८]। ऐकोनियां वानरगण। अश्रुपूर्ण जाले नयन। रुदन स्फुंदोन ते करीती ॥४३॥

**रामांच्या आदेशावर सुग्रीवाची प्रतिक्रिया :** ऐकोनि श्रीरामवचन। सुग्रीव बोलिला गर्जोन। सांडोनियां रामचरण। मागें आपण सरूंना ॥४४॥ निकट आल्या प्राणांत। ओढवलिया

शब्दार्थ : १. नाश, २. राक्षससमुदाय, ३. मोठमोठे योद्धे, ४. काळोख, ५. सैन्यासह, ६. सुलभपणे, ७. सैन्य, ८. शोक

कल्पांत। नाहीं सांडणें रघुनाथ। निश्चितार्थ हा माझा॥४५॥ कैंचें राज्य कैंचें छत्र। कैंचें कलत्र[1] कैंचें पुत्र। सखा सांडोनि श्रीरामचंद्र। अणुमात्र[2] ढळूंना॥४६॥ सांडोनियां रघुनंदन। आठवी स्त्रियादि भोग भवन। तेव्हांचि त्याचें काळें वदन। आकल्प पतन तयासी॥४७॥

बिभीषणस्तु रामस्य दृष्ट्वा गात्रं शरैश्चितम् । लक्ष्मणस्यच धर्मात्मा बभूव व्यथितस्तदा॥१२॥
जलक्लिन्नेन हस्तेन तयोर्नेत्रे विमृज्य च। शोकसंपीडितमना रुरोद विललाप ह॥१३॥

**बिभीषणाच्या जलसिंचनाने रामलक्ष्मणांना शुद्धी :** सर्वांगीं खोचोनियां बाण। रणीं पडले राम लक्ष्मण। तें देखोनियां बिभीषण। करी रुदन अति दुःख॥४८॥ बैसोनियां सुग्रीवापासीं। बिभीषण रडे आक्रोशीं। कपटें छळोनि राक्षसीं। रणीं रामासी पाडिलें॥४९॥ खोंचले देखोनियां बाण। जळहस्तें बिभीषण। श्रीराम आणि लक्ष्मण। करी स्पर्शन सर्वांगीं॥५०॥ बिभीषणहस्तींचें उदक। तेणें निवारेल देहदुःख। श्रीरामलक्ष्मण नावेक[3]। पावले सुख शरबंधीं॥५१॥ बिभीषणहस्तोदकगुण। दोघे झाले सावधान[4]। परी सर्वांगीं विकळपण। अर्ध क्षण बैसवेना॥५२॥ सुग्रीव आणि बिभीषण। दोघे देखोनि अति उद्विग्न। ते काळीं अंगद आपण। बोले गर्जोन तें ऐका॥५३॥ श्रीराम आणि लक्ष्मण। सुग्रीवादि वानरगण। सुख पावती संपूर्ण। तें मी करीन अवधारा॥५४॥

अथाब्रवीद्वानरेंद्रः सुग्रीवः पुत्रमंगदम्। सुषेणं श्वशुरं पार्श्वे समाहूयेदमब्रवीत्॥१४॥
सहशूरैर्हरिगणैर्लब्धसंज्ञावविक्लवौ। उभौ प्रापयतः क्षिप्रं किष्किंधां रामलक्ष्मणौ॥१५॥

**अंगदास सुग्रीवाचा आदेश :** सुग्रीव सांगे अंगदासी। पाचारोनि सुषेण शूरासी। सकळसैन्य समुदायेंसीं। न्यावे किष्किंधेसीं राम सौमित्र॥५५॥ ऐकोनि सुग्रीवाची युक्ती। अंगदें अति विनयवृत्तीं। सुग्रीवादि सकळ जुत्पती। केली विनती अभिवंद्य॥५६॥ सुग्रीव राजा कपिपती। घेवोनि सौमित्र सीतापती। न वचतां[5] किष्किंधेप्रती। वानर न ढळती ससैन्य॥५७॥ स्वामी तुज सुग्रीवेंवीण। वेगळे न होती वानरगण। घेवोनि राम लक्ष्मण। जावें आपण किष्किंधेसीं॥५८॥

अहं तु रावणं हत्वा सपुत्रं सहबांधवम् । मैथिलीमानयिष्यामि शक्रो नष्टामिव श्रियम्॥१६॥
सर्वे गच्छंतु विश्वासाद्वज्रांगो मारुतात्मजः। अनेनाहं सहायेन हनिष्ये राक्षसाधिपम्॥१७॥

**अंगदाचे प्रतिवचन :** सुग्रीव सुषेण जुप्तती समस्त। नळनीळादि जांबवंत। अंगद लोटांगणें विनवीत। निजपुरुषार्थ लक्षोनी॥५९॥ लब्धसंज्ञ[6] राम लक्ष्मण। दोघे जाले सावधान। येथोनि यांसी नाहीं मरण। विकळ पूर्ण सर्वांगीं॥६०॥ जंव विकळ राम लक्ष्मण। तंव सुग्रीवादि वानरगण। समस्तांहीं होवोनि सावधान न्यावे । दोघे जण किष्किंधे॥६१॥ मागें मी एकला आपण। मारीन इंद्रजित कुंभकर्ण। रणीं निर्दाळीन रावण। सपुत्रप्रधानसैन्यासीं॥६२॥ माझेनि विश्वासें समस्त। सुखीं जावें सुनिश्चित। एक ठेवावा हनुमंत। रणसाह्यार्थ मजलागीं॥६३॥ याचेनि रणसाह्यपणीं। करीन रावणाची धूळधाणी। मारीन राक्षसांच्या श्रेणी[7]। सीता जननी सोडवीन॥६४॥ करोनियां समुद्रमथन। इंद्रें श्री काढिली शोधून। तेंवी राक्षस दमून । सीता चिद्रत्न आणीन॥६५॥ लंका बिभीषणा दिधली दान। जें कां श्रीरामवाचाऋण। तें मी होईन उत्तीर्ण। बिभीषण येथें ठेवा॥६६॥ रणीं मारोनि रावणासी। स्वयें सोडवीन सीतेसी। राज्य देईन बिभीषणासी। रामऋणासीं उतराई॥६७॥

**अंगदाचे वचन ऐकून सुग्रीवास आनंद व प्रतिक्रिया :** इतुकें करोनि लंकेसीं। सीता घालोनि शिबिकेसीं[8]। गर्जत येईन किष्किंधेसीं। सत्य वचनासी मानावें॥६८॥ ऐकोनि

**शब्दार्थ :** १. स्त्री, २. किंचित् देखील, ३. क्षणभर, ४. सावध झालेले, ५. न जाता, ६. शुद्धीवर आलेले, पावलेले, ७. समुदाय, ८. पालखीत

अंगदअनुवादन। सुखावला सुग्रीव आपण। हरिखें चुंबोनियां वदन। संतोषोन स्वयें डोले॥६९॥ धन्य अंगदां तुझी वचनावळी। धन्य अंगदा तुझी शैली। वीर शूर आतुर्बळी। वानरकुळीं अंगद॥७०॥ जैसा बोलिलासी तैशी शक्ती। तैसी करूं शकसी ख्याती। निधडा वीर तूं त्रिजगतीं। वानूं किती गुण तुझे॥७१॥ तूं एकला करिसी रण। आम्ही घेवोनि राम लक्ष्मण। किष्किंधे जातां पैं पळोन। अतिजघन्य[1] पैं आम्हां॥७२॥ नगरी हांसिजे वानरीं। स्वर्गी हांसिजे सुरवरीं। हांसिजेल ऋषीश्वरीं। चराचरी[2] अतिनिंद्य॥७३॥ इंद्रजित आलिया कुंभकर्ण। ससैन्य आलिया रावण। मागें सरणें नाहीं जाण। केलें निर्वाण[3] सुग्रीवें॥७४॥

हनुमंताला हर्ष : ऐकोनि अंगदाची मात। हरिखला हनुमंत। आला स्वानंदें गर्जत। राक्षसांतकृतकारी॥७५॥ अंगद माझा निजसखा। मी अंगदाचा पाठीराखा। मारावया दशमुखा। विचार इतुका कायसा॥७६॥ जांबवंत सुग्रीव बिभीषण। नळनीळादी वानरगण। श्रीरामाचें शरणबंधन। निर्बंधन केंवी होय॥७७॥

नारदमुनींचे आगमन व श्रीरामांस वंदन : ऐसा करितां विचार। तंव तपस्तेजाचा डोंगर। आला नारद मुनीश्वर। करीत गजर नामाचा॥७८॥ नारदाची निजआवडी। श्रीराम मारील राक्षसकोडी। डोळेभरी पाहीन गोडी। कडोविकडीं नाचत॥७९॥ शस्त्रास्त्रीं वीर वानरगणीं। श्रीराम भिडेल झोंटधराणीं। त्याही युद्धाची घेईन धणी। शेंडी थरकोनी थडथडित॥८०॥ पाताळीं युद्ध न पडे दृष्टी। नारद पायें पृथ्वी पिटी। नसतां मृत्युलोकीं रणगोष्टी। तैं त्या उठी पोटशूळ॥८१॥ स्वर्गी नाहीं रक्षकल्लोळ। नारदा कपाळशूळ। लंकाभुवनीं रणगोंधळ। केला सुकाळ श्रीरामें॥८२॥ संग्रामपीक आलें प्रबळ। पडिले शरबंधनाचे टोळ। नारद उडवील तत्काळ। रणसुकाळ पहावया॥८३॥ पहावया श्रीरामरणगोडी। नारदासीं परम आवडी। फेडावया शरबंधसांकडी[4]। अति तांतडी[5] तो आला॥८४॥ श्रीरामाचा निजबाण। ज्या लागे तो ब्रह्म पूर्ण। ऐसें पहावया निर्वाणरण[6]। आवडी गहन नारदासीं॥८५॥

एतस्मिन्नेव काले तु महायोगबलन्वितः। आजगाम महातेजा देवर्षिर्नारदस्तथा॥१८॥
राघवस्य समीपे तु निपपात सखीकृतः। कृत्वा प्रदक्षिणं रामंतेषां मध्ये वनौकसाम्॥१९॥
अभितुष्टाव काकुत्स्थं स्मारयन्पूर्वजन्म च। राम राम महाबाहो शृणुष्व वदतां वर॥२०॥
दिव्यं लक्ष्मणसंयोगं किमात्मानं न बुध्यसे। भवान्नारायणः श्रीमान्सर्वलोकनमस्कृतः॥२१॥

नारदाचे श्रीरामपराक्रमवर्णन व विनंती : श्रीराम देखोनि शरबंधनीं। नारद येवोनि तेच क्षणीं। प्रदक्षिणा लोटांगणीं। लागला चरणीं रामाच्या॥८६॥ अगाध नारदाचें महिमान। तपस्तेजें देदीप्यमान। मानूनि श्रीरामभक्त पूर्ण। वानरगण स्वयें वंदिले॥८७॥ मी एक श्रेष्ठ महामुनी। वानर वनचर हीन भजनीं। ऐसें नारद कदा न मानी। घाली लोटांगण समसाम्य[7]॥८८॥ जोचि भाव श्रीरामचंद्रीं। तोचि भाव वानरांवरी। प्रदक्षिणा नमस्कार करी। भिन्नत्व न धरी अणुमात्र॥८९॥ ऐसी साधूंची शुद्ध शैली[8]। नारदीं नांदे सुखसमेळी। तो येवोनि श्रीरामाजवळी। सांगे समूळीं मूळकथा॥९०॥ तुझें स्वरूप द्वंद्वविहीन। मिथ्या मानिसी शरबंधन। होवोनियां सावधान। करीं कंदन राक्षसां॥९१॥ तुझें होताहे निर्वाणरण। पाहूं आलों मी आपण। घेवोनियां धुनष्यबाण। करीं कंदन राक्षसां॥९२॥ ऐसें सांगतां नारदमुनी। श्रीराम नुठी शरबंधनीं। मुख्य स्वरूप प्रबोधोनी। अनुवादे वाणी ते ऐका॥९३॥ तूं तंव सर्वभूतीं सबाह्य पूर्ण। पूर्णपणें निजनिर्गुण। निर्गुणत्वें तूंचि सगुण। निजलक्ष्मण

शब्दार्थ : १. फार नीचपणा, २. चराचरात्मक सर्व सृष्टीत. ३. अखेरचा निश्चय, ४. शरबंधनाचे संकट ५. त्वरेने, ६. निकराची लढाई, ७. सारख्या भावाने, ८. रीते.

निधारीं ॥९४॥ मत्स्यरूपें अवसरोन। शंखासुरातें मर्दून। स्वयें केलें वेदोद्धरण। तूं आदिकारण श्रीरामा ॥९५॥ कूर्मरूपें तूं आपण। पृष्ठभागीं धरा धरोन। करोनिया समुद्रमंथन। काढिलीं पूर्ण चौदा रत्नें।॥९६॥ वराहरूपें तूंचि जाण। निमग्न धरा[1] उद्धरोन। हिरण्याक्ष निर्दाळून। जालासी आपण स्वयें वराह ॥९७॥ प्रल्हादकैवारालागीं जाण। अचेतन खांब फोडून। हिरण्यकशिपा विदारून। जालासी आपण नृसिंह रामा ॥९८॥ कां उपेंद्ररूपें[2] आपण। दानप्रसंगें बळीचें छळण। शेखीं[3] जालासी बळीचे अधीन। म्हणती वामन द्वारपाळ ॥९९॥ परशुराम तूं ब्रह्मक्षत्रीं। गो ब्राह्मणांचा कैवारी। सहस्रार्जुनासी करिसी बोहरी। धरा निःक्षत्री त्रिसप्तकें[4]।॥१००॥ तो तूं सातवा अवतार। प्रत्यक्षाकारें श्रीरामचंद्र। मिथ्या शरबंध शरपंजर। उठीं सत्वर रिपुदळणीं ॥१॥ ऐसें नारदें सांगतां आपण। शिववरदाचे वरदबाण। मिथ्या न करी श्रीरघुनंदन। ऋषि पूर्ण जाणों सरला ॥२॥ तूं तंव साक्षात नारायण। शेषशायी श्रीजनार्दन। तूं तंव जगाचा जीवन[5]। गरुडवाहन श्रीरामा ॥३॥ गरुड तुझा निजसेवक। हात जोडोनि उभा संमुख। शरबंध छेदावया देख। त्यासी आवश्यक स्मरावें ॥४॥

श्रीरामाचे नारदास उत्तर : श्रीराम म्हणे नारदाप्रती। गरुडस्वामी मी रघुपती। शरबंधाचे निवृत्ती[6]। सेवका काकुलती केंवी करूं ॥५॥ माझा स्वामी श्रीशंकर। निवारील शरपंजर। ऐसें ऐकतां उत्तर। शिव सत्वर धांविन्नला ॥६॥

शंकराच्या आज्ञेने गरुडाचे आगमन : शिव सांगे गरुडासी। तूं तंव महा मूर्ख होसी। शरबंध लागला श्रीरामासीं। शीघ्र त्यापासीं तूं जाय ॥७॥ माझ्या वरदाचे वरद बाण। स्वयें छेदीना रघुनंदन। तुवां जावोनि आपण। शरबंधन छेदावें ॥८॥ माझ्या वरदाचे सर्पशर। तिहीं बांधिला श्रीरामचंद्र। तुवां जाणोनि सत्वर। नागशर छेदावें ॥९॥ ऐकोनि शिवाचें उत्तर। गरुडासीं उल्लास थोर। वंदावया श्रीरामचंद्र। अति सत्वर चालिला ॥११०॥

एतस्मिन्नन्तरे वायुर्मेघाश्चासन्सविद्युतः। पर्यस्तं सागरे तोयं कंपंतश्च महीधराः ॥२२॥
महता पक्षवातेन सर्वे तीररुहा द्रुमाः। बहवः पातिता भग्नाः समूला लवणांभसि ॥२३॥
ततो मुहूर्ताद्गरुडं वैनतेयं महाबलम्। वानरा ददृशुः सर्वे ज्वलंतमिव पावकम् ॥२४॥
तमागतमभिप्रेक्ष्य नागास्ते विप्रदुद्रुवुः। यैस्तु तौ पुरुषौ बद्धौ शरभूतैर्महाबलैः ॥२५॥
ततः सुपर्णः काकुत्स्थौ दृष्ट्वा प्रत्यभिवाद्य च। विममर्श च पाणिभ्यां मुखे चंद्रसमप्रभे ॥२६॥

गरुडाच्या पक्षघाताच्या आवाजाने सर्पांचे पलायन : गरुडें करितां उड्डाण। उभयपक्षांचा पवन। पर्वतवृक्ष उन्मळोन। पडती आण समुद्रीं ॥११॥ खचोनि पडती गिरिकडे। पक्षी किलकिलती बापुडे। समुद्रजळ गगना उडे। अति झडाडें पक्षांच्या ॥१२॥ पक्षवात तो मेघ निर्वाहे[7]। उसळलें जळ वर्षताहे। सुवर्णपक्ष विद्युत्प्राये। झळकताहे आकाशीं ॥१३॥ तेजोराशि दैदीप्यमान। कपि देखती गरुडागमन। न लागतां अर्धक्षण। आलें उड्डाण शरबंधा ॥१४॥ येतां गरुडाचें उड्डाण। सर्पोद्धुत शरबंधन। पळोनि जाले शिवभूषण। गरुडाभेणें[8] अतिधाकें ॥१५॥

गरुडभयाने सर्पांचे शंकराच्या शरीरावर आरोहण : वेगळें पाहतां आपण। गरुड करील पैं विदारण। सर्प जाले शिवभूषण। निजमरण चुकवावया ॥१६॥ शिवाचिया अंगावरी। बाहुभूषणें उरीं शिरीं। लपती सर्पांचिया हारी। देखोनि सर्पारी[9] अति धाकें ॥१७॥

रामलक्ष्मण संपूर्ण सावध; गरुडाचे रामांना वंदन व क्षमायाचना : शरबंधनी सर्पबंधन। ते सर्प

शब्दार्थ : १. पृथ्वी, २. वामनरूपाने, ३. शेवटी, ४. एकवीस वेळां, ५. आधार, ६. मुक्ततेकरिता, ७. धारण करिता झाला, ८. गरुडाच्या भीतीने, ९. गरुड.

जातांचि पळोन। श्रीराम आणि लक्ष्मण। सावधान स्वयें जाले।।१८।। सावध होतां रघुनंदन। गरुड घाली लोटांगण। मी तंव अपराधी दारुण। क्षमा संपूर्ण मज कीजे।।१९।। पुढती नमन लोटांगण। पुढती करी प्रदक्षिण। मी तंव अपराधी दारुण। क्षमा संपूर्ण मज कीजे।।१२०।। मज लागल्या शरबंधन। तुवां सांडिलें उपेक्षून[1]। ऐसे श्रीरामा तूं न म्हण। शठ पूर्ण मज न मानीं।।२१।। शरबंधाचिये संकटीं। म्यां नाहीं ऐकिले जगजेठी। शिवें सांगताचिं गोष्टी। उठाउठीं मी आलों।।२२।। मज येतांचि पैं जाण। फिटलें सर्प शरबंधन। माझेनि दोघां मुक्तपण। सेवा संपूर्ण हे माझी।।२३।। मी तंव घरगुती आप्त। दोघांही केलें शरनिर्मुक्त। हेचि सेवा सुनिश्चित। श्रीरघुनाथसुखार्थी।।२४।।

सर्पबंधनाचा प्रताप : सर्पशरबंध दारुण। आल्या सुरासुरगण। मिळालिया सिद्ध चारण। शरबंधन सुटेना।।२५।। ब्रह्म शक्र[2] कुबेर वरुण। आल्या कोटिकोटि सुरगण। सर्पोद्भुत शरबंधन। सर्वथा जाण सुटेना।।२६।। अठ्यायशीं सहस्र ऋषिपंक्ती। आल्या तपस्वी तेजोमूर्ती। सर्पशरबंधनिवृत्ती। त्यांच्या निजशक्तीं न करवे।।२७।। सर्पशरबंध अति कठिण। ब्रह्मादिकां अगम्य जाण। त्याचें केलें म्यां निवारण। सेवा संपूर्ण श्रीरामीं।।२८।। असतां दिव्यास्त्रें संपूर्ण। दोघां दुर्गम शरबंधन। तें म्या निवारिलें जाण। सेवा संपूर्ण हे माझी।।२९।। तुमच्या अंगीं रुतले बाण। त्यांचे बुजवांवे वण। करितां गरुडें परिमार्जन। लज्जायमान स्वयें जाला।।१३०।।

सर्पबंधनाचा रामलक्ष्मणावर काहीच परिणाम नाही : श्रीराम आणि लक्ष्मण। अंगीं रुपले नाहींत बाण। अंगासीं पडला नाहीं वण। परिमार्जन तें काय।।३१।। शरबंधीं सर्प शिवभूषण। करिती श्रीरामस्तवन। शरबंधीं रघुनंदन। सुखसंपन्न स्वानंदें।।३२।। शरबंधीं सर्प सतत। शोधितसत्व समस्त। भाग्यें उठिला रघुनाथ। नित्यमुक्त श्रीराम।।३३।। शरबंधीं सुखसंपन्न। सर्प करिती मधुर स्तवन। लक्ष्मण तोचि शेष शयन। रघुनंदन सुखशायी।।३४।। गरुडें सोडविलें सर्पबंधन। हें तों माझें मिथ्या वचन। श्रीराम नित्यमुक्त चिद्‌धन। लज्जायमान वैनतेय[3]।।३५।। शरबंधीं राम सुखसंपन्न। शरसर्प करिती रामस्तवन। अगाध श्रीराममहिमान। मी केंवी दीन आकाळीं।।३६।। श्रीरामप्रतापनिजनिवाडें। सेवा कीजे चंद्रचूडें[4]। तेथें मी काय बापुडें। श्रीरामापुढें सामर्थ्यें।।३७।। शरबंध करावया निर्मुक्त। अतिशयेंसीं मी समर्थ। ऐसा गर्वें होता फुंजत[5]। तोही गर्वहत श्रीरामें।।३८।। श्रीरामसामर्थ्य चोखडें। कळिकाळ न पाहे तयाकडे। येथें मी कायसें बापुडें। पायां पडे अनुतापें।।३९।।

रावणं च रणे हत्वा सीतां त्वमुपलप्स्यसे। इत्येवमुक्त्वा वचनं संपूर्णः शीघ्रविक्रमः।।२७।।
रामं च निरुजं कृत्वा मध्ये तेषां वनौकसाम् । प्रदक्षिणं तु तं कृत्वा परिष्वज्याभिवाद्य च।।२८।।
जगामाकाशमाविश्य गरुडः पवनो यथा । नीरुजौ राघवो दृष्ट्वा ते तु वानरयूथपाः।।२९।।
प्रहृष्टाः ससृजूर्नादान्राक्षसानां भयावहान्। ततो भेरीः समाजघ्नुर्मृदंगांश्चाप्यवादयन्।।३०।।
दध्मुः शंखान्संप्रहृष्टाः क्ष्वेलंत्यपि यथापुरम्।।३१।।

गरुडाचे रामास वंदन व प्रयाण : ते काळीं गरुडें आपण। प्रदक्षिणा लोटांगण। हरिखें[6] वंदोनि[1] वानरगण। प्रेमसंपूर्ण श्रीरामीं।।१४०।। वानर पूर्ण श्रीरामभक्त। गरुडें जाणोनि निश्चित। कपिकुळासमवेत। श्रीरघुनाथ अभिवंदी।।४१।। पुढती पुढती प्रदक्षिणा। पुढती पुढती लोटांगणा। हर्षे वंदी वानरगणा। करावया गमना पूसत।।४२।। देखोनि गरुडाचें प्रेम पूर्ण । श्रीराम झाला सुप्रसन्न। देवोनि आलिंगन समाधान। करवी गमन स्वानंदें।।४३।।

शब्दार्थ : १. हयगय करून, २. इंद्र, ३. गरुड, ४. शंकराने, ५. प्रौढी मिरवीत, ६. आनंदाने.

गरुडाचे आशीर्वचन, रामाच्या अस्त्रामध्ये प्रवेश : गरुडें करितांचि गमन। श्रीरामासीं आशीर्वचन। अनुवादला संतोषोन। गिरागर्जन तें ऐका॥४४॥ रणीं मर्दूनि रावणासी। राज्य देवोनि बिभीषणासी। सीता आणोनि स्वानंदेसीं। सुखी होसी श्रीरामा॥४५॥ गरुडें नमूनि श्रीरामासी। वेगें उसळला नभासीं। पवन प्रवेशें आकाशीं। तेणें वेगेंसीं निघाला॥४६॥ रामरावण झुंजारी[1]। पहावया उल्लास गरुडा भारी। श्रीरामभात्याभीतरीं। गरुड गरुडास्त्रीं प्रवेशे॥४७॥ अस्त्रदैवतें अत्यद्भुतें। यश पावावया श्रीरामहस्तें। भातां दाटलीं समस्तें। रणसाह्यार्थ श्रीरामा॥४८॥ राम शस्त्रांची निजगती। राम अस्त्रदेवतां निजशक्ती। राम जगदात्मा त्रिजगतीं। राम निश्चितीं परब्रह्म॥४९॥ गरुडें केलिया गमन। श्रीराम देखोनि सावधान। वानरां आलें स्फुरण। करिती गर्जन हरिनामें॥१५०॥ हरिखाच्या[2] निजगजरीं। निशाणें त्राहाटिल्या भेरी। ताल घोळ मृदंग मोहरी। शंख वानरीं आस्फुरिले[3]॥५१॥

श्रीराम शुद्धीवर आल्यामुळे सर्वत्र आनंद : श्रीराम नित्य सावधान। वर्म जाणोनि वानरगण। रणीं मर्दावया रावण। गुढिया उभवोनि नाचती॥५२॥ वाजंत्र्यांचा ध्वनि गंभीर। वानरीं केला भुभुःकार। त्यामाजी रामनामाचा गजर। नामीं अंबर कोंदलें॥५३॥ नाम कोंदले गगनीं। आनंद झाला त्रिभुवनीं। दचकल्या राक्षसश्रेणी। ऐकतां ध्वनी सुटला कंप॥५४॥ ऐकतांचि ते नादध्वनी। रावण दचकला सिंहासनीं। इंद्रजित दचकला मनीं। राम शरबंधनी सूटला॥५५॥ सुटोनिया शरबंधन। श्रीराम जाला सावधान। सुमनें वर्षती सुरगण। उल्लास संपूर्ण सर्वांसी॥५६॥ एका जनार्दना शरण। श्रीराम नित्य सावधान। पुढील कथा अति पावन। मोक्षोपपादन श्रोतयां॥५७॥ नर वानर निशाचर। युद्ध करिती घोरांदर[4]। तें मोक्षाचें निजमाहेर। कथा पवित्र श्रीरामें॥५८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटिकायां रामशरबंधननिर्मुक्तिर्नामत्रयोदशोऽध्यायः॥१३॥ओंव्या॥१५८॥श्लोक॥३१॥ एवं॥१८९॥

## अध्याय चौदावा

॥ श्रीसीतारामाभ्यां नमः ॥

### धूम्राक्षाचा वध

सर्पशरबंधातून सावध झाल्यावर श्रीरामाचे सैनिकांना आलिंगन : सर्पशरबंधापासून। सुटले राम लक्ष्मण। दोघीं सज्जिलें धुनष्यबाण। ठाणमाणसाटोपें॥१॥ सावध होवोनि रघुनाथ। सुग्रीव अंगद जांबवंत। बिभीषण हनुमंत। कपि समस्त आलिंगी॥२॥ एक एक वानरवीर। स्वयें आलिंगी रामचंद्र। वानरीं केला भुभुःकार। जयजयकारें गर्जती॥३॥

वानरसैन्याच्या रामनामाच्या गजराने रावण भयभीत, दूतांकरवी शोध आणतो : रामनामाचा गजर। वानरीं केला अति सधर[5]। नामें दुमदुमिलें अंबर। दशशिर दचकला॥४॥

तेशां तु तुमुलं शब्दं वानराणां तरस्विनाम्। नर्दतां राक्षसैः सार्द्धं तदा शुश्राव रावणः॥१॥
उवाच रक्षसां श्रेष्ठः समीपपरिवर्तिनः। ज्ञायतां तूर्णमितेषां सर्वेषां वनचारिणाम्॥२॥
तौ च बद्धौ शरैस्तीक्ष्णैर्भ्रातरौ रामलक्ष्मणौ। शोककाले समुत्पन्ने हर्षकारणमुत्तमम्॥३॥
ते तथोक्तास्तु संभ्रांताः प्राकारमधिरुह्य च। विषण्णवदनाः सर्वे राक्षसेंद्रमुपस्थिताः॥४॥

वानरांचा गिरागजर। ऐकोनियां दशशिर। आप्त पाचारोनि निशाचर। सांगे विचार भयचकित॥५॥ शरबंधीं राम लक्ष्मण। बांधोन टाकिले अचेतन। वानरां शोककाल दारुण। हर्ष संपूर्ण केसेनि॥६॥ तरी तुम्ही सौमित्रासमेवत। पहावा शरबंधीं रघुनाथ। वानरां हर्ष

शब्दार्थ : १. रामरावणांचे युद्ध, २. आनंदाच्या, ३. वाजविले, ४. भयंकर, ५. मोठ्या जोराचा.

किमर्थ। समूळ वृत्तांत आणावा।।७।। देखोनि वानरांचें स्फुरण। बाहेर येतां राक्षसगण। धाकें जाऊं पाहे प्राण। कंपायमान भयभीत।।८।।

रावणदूतांनी गोपुरावरून रामलक्ष्मण शरबंधातून मुक्त झाल्याचे कळविले व त्यांचा घबराट : पहावया वानरवृत्तांत। गोपुरा[1] चढले रावणदूत। तेथोनि टकमकां पाहत। अत्यद्‌भुत देखिलें।।९।। तोडोनियां शरबंधन। श्रीराम आणि लक्ष्मण। वाहोनियां धनुष्यबाण। आले दारुण संग्रामा।।१०।। दोहीं बाहीं कपिकुंजर। नामें गर्जती वानर। शिळाशिखरद्रुमपाणि[2] वीर। आलें सत्वर युद्धार्थी।।११।। उठिला देखोनि रघुनंदन। दूतांचा जाऊं पाहे प्राण। अतिशयें म्लानवदन। आले परतोन सभेसीं।।१२।। धाकें दूतांचें पळालें पाणी। तोंड कोरडें विकळ वाणी। राम सुटोनि शरबंधनी। आला कोपोनी रणमारा।।१३।।

तदप्रियं दीनमुखा रावणस्य निशाचराः। न्यवेदयन्यथावृत्तं सर्वे वाक्यविशारदाः।।५।।

दूतांचा वृत्तांत ऐकून रावण व इंद्रजित भयभीत : शरबंधी सुटला रघुनाथ। ऐकोनि दूतांचा वृत्तांत। रावण जिव्हारीं[3] कांपत। इंद्रजित स्वयें धाके।।१४।। इंद्रजित धाके जीवाआंत। जरी उठिला रघुनाथ। तरी राक्षसां आला अंत। कुळघात समूळीं।।१५।। वानरभार अति दुर्धर। साह्य झाल्या श्रीरामचंद्र। रणीं मारिती निशाचर। लहान थोर निवटोनी।।१६।।

तच्छ्रुत्वा वचनं तेषां राक्षसेंद्रोऽथ रावणः। चिंतारोषपरीतांगो विवर्णवदनोऽभवत्।।६।।
अब्रवीद्रक्षसां मध्ये धूम्राक्षं नाम राक्षसम्। बलेन महता युक्तो राक्षसां भीमविक्रमाः।।७।।
निष्क्रमस्व वधायाशु राघवस्य वनौकसाम्। एवमुक्तस्तु धूम्राक्षो राक्षसेंद्रेण धीमता।।८।।
कृत्वा प्रणामं संहृष्टो निर्जगाम नृपाज्ञया।।९।।

रावण सचिंत, ससैन्य धूम्राक्षास रणांगणावर पाठवितो : शरबंधीं मुक्त राम लक्ष्मण। ऐकोनि हेरांचे वचन। चिंतातुर दशानन। म्लानवदन होंसरला[4]।।१७।। कोप आला रावणासी। पाचारोनि धूम्राक्षासी। रणीं मारावया वानरांसी। धाडी युद्धासी साक्षेपें।।१८।। तुझा जो कां सैन्यभार। निधडे वीर निशाचर। ध्वज रथ अश्व कुंजर। संग्रामा शीघ्र निघावें ।।१९।। ऐकोनि रावणाचें वचन । धूम्राक्षें करोनियां नमन। अति उल्लासें गर्जोन । निघे आपण संग्रामा ।।२०।। युद्धा निघाले निशाचर । करोनियां वीरशृंगार। चालिले पायांचे[5] मोगर[5]। गर्जत वीर आल्हादें।।२१।। फरश पट्टिश तोमर। शूळ परिघ गदा मुद्गर। लहुडी भिंडिमाळा खड्ग चक्र। धनुर्धर पायांचे।।२२।। अश्वीं बाणली मोहाळी[6]। आरसे झळकती पाखरांतळीं। वीर वळंघले आतुर्बळी। घोडी रणमूळीं नाचविती।।२३।। मद गाळिती कुंजर। पालाणिले[7] अति अपार। घंटा घागरिया अलंकार। ध्वजा विचित्र शोभती।।२४।। दांती लोहशेंब्या तिखट। वरी वळंघले वीरवाट। रथ चालिले घडघडाट। वीर उद्भट युद्धार्थी।।२५।।

वृकसिंहमुखैर्युक्तं खरैः कनकभूषणैः। आरुरोह रथं दिव्यं धूम्राक्षः खरनिस्वनः।।१०।।
स निर्ययौ महातेजा धूम्राक्षो राक्षसेर्वृतः। पश्चिमेन तु द्वारेण हनूमान्यत्र तिष्ठति।।११।।
रथशीर्षे महाभीमो गृध्रो विनिपपात ह। ध्वजाग्रे पक्षिणस्तस्य निपेतुर्मांसभोजनाः।।१२।।
रुधिरार्द्रं महच्छ्वेतं छत्रमस्य पपात ह। स उत्पातांश्च तान्दृष्ट्वा राक्षसानां भयावहान्।।१३।।
प्रादुर्भूतान्महाघोरान्धूम्राक्षो व्यथितोऽभवत्।।१४।।

धूम्राक्षाला अपशकून होतात : सिंहमुख वृक जंबुक खर। तिहीं जुंपिला रहंवर[8]। सुवर्णपाखरा[9] सालंकार। रथावर शोभती।।२६।। रथीं ध्वज अति विचित्र। झळके माथां श्वेत छत्र। रथीं बैसतां धूम्राक्ष। जालें विचित्र तें ऐका।।२७।। गृध्र[10] येवोनि त्वरेकरीं। बैसला

शब्दार्थ : १. द्वारावरील मजल्यावर, २. शिळा, शिखरे, आणि वृक्ष हातात घेणारे, ३. अंतःकरणात, ४. झाला, ५. पायदळ, ६. मोहरकी (घोड्याचे तोंडाला बांधलेली दोरी) ७. शृंगारिले, ८. रथ . ९. सोन्याच्या झुली. १०. गिधाड.

रथाच्या ध्वजावरी। मांस भक्षितां गलितरुधिरीं। श्वेत छत्रें करी आरक्त।।२८।। ध्वजीं गृध उडवितां। धूम्राक्ष झडपिला माथां। करून त्याच्या छत्रपाता। होय उडता आकाशीं।।२९।। अनेक उठिले उत्पात[1]। भूस्फोट राजद्वारीं होत। सवेंचि जाला अशनिपात[2]। वाजला आघात आकाशीं।।३०।। वायु प्रतिकूळ दुर्धर। रजें झांकोळले नेत्र। गगनींहूनि वर्षे रुधिर[3]। दुश्चिन्हें थोर उठलीं।।३१।। दुश्चिन्हें अत्यद्भुत। देखोनियां अति उत्पात। धूम्राक्ष जाला भयभीत। चिंताग्रस्त पैं जाला।।३२।। ऐशा अपशकुनाभेण। मागें परततां आपण। विटंबे दंडिल रावण। नाक कान छेदोनी।।३३।। मागें पळतां विटंबण। रणीं भिडतां मुक्तपण। येणें उल्लासें तो जाण। निघे आपण युद्धासी।।३४।। नरकपात मागें पळतां। रणीं पडल्या सायुज्यता। श्रीरामचरणीं प्राण देतां। ब्रह्मस्वरूपता सुलभ।।३५।। येणें विचारें संपूर्ण। धूम्राक्ष स्वयें आपण। न मानून अपशकुन। करावया रण स्वयें आला।।३६।। पश्चिमद्वारें जंव निघत। ते द्वारीं यूथप हनुमंत। वानरभारें संयुक्त। काळकृतांत बैसला।।३७।।

> निर्यातं प्रेक्ष्य धूम्राक्षं राक्षसं भीमदर्शनम् । विनेदुर्वानराः सर्वे प्रहृष्टा युद्धकांक्षिणः ।।१५।।
> तेषां सुतुमुलं युद्धे संजज्ञे हरिरक्षसाम् । अन्योन्यं पादपैर्घोरैर्जघ्नुस्ते शूलशक्तिभिः ।।१६।।
> वानरा राक्षसैर्घोरैर्व्यथिताश्च विदारिताः। वानरै राक्षसाश्चापि द्रुमैर्भूमिः समीकृता ।।१७।।
> विदार्यमाणा रक्षोभिर्वानरास्ते महाबलाः। जगृहुः पादपांश्चैव शिलाश्च हरियूथपाः ।।१८।।
> ते भीमवेगा हरयो नर्दमानाः सहस्रशः। ममंथू राक्षसान्घोरान्नामानि च बभाषिरे ।।१९।।

**अपशकुनांची पर्वा न मानता धूम्राक्षाचे प्रयाण :** धूम्राक्ष महानिशाचर। गज वाजी[4] रथ सहपरिवार। येतां देखोनि वीरसंभार। हरिखें वानर नर्तती[5]।।३८।। येतां देखोनि राक्षसभार। शिळा वृक्ष पर्वत शिखर। वानर उठिले करिता मार। तेणें निशाचर खवळले।।३९।।

**राक्षस व वानर यांचे युद्ध :** वानर आणि निशाचर । युद्धास मिसळले सत्वर। येरयेरां करिती मार। घाय निष्ठुर हाणोनी।।४०।। शूळ शक्ति गदा मुद्गर। मुसळें मारितां वानर। करीत गोफण गुंडामार। निशाचर खवळले।।४१।। घाय चुकवोनि वानर। पुच्छें निवारून शस्त्रसंभार। नखीं विदरिले निशाचर। वाहे रुधिर महावीरां।।४२।। वानर हाणोनि मुष्टिघात। राक्षसां पाडिती मूर्च्छित। राक्षस जंव मारूं जात। तंव ते उडत आकाशीं।।४३।। गगना उसळतां वानर। राक्षसीं विंधोनियां तीर। बाणें खिळोनि केला मार। नाचती कपींद्र रणोन्मत्त।।४४।। करावया राक्षसांसी घात। वानर होवोनि एकीभूत। गगना उसळोनि समस्त। शिळा पर्वत वर्षती।।४५।। होतां शिळापर्वतपात। वोडण खड्ग बाण समस्त। शिळातळीं चूर्ण होत। वीर निमत[6] असंख्य।।४६।। वानर हरिनामें गर्जत। राक्षस क्षितितळीं कुंथत। घायवट[7] आक्रंदत। आला अंत राक्षसां।।४७।। मणिमुक्तसुवर्णकवचें। वीर लेइले ब्रीदाचे। हृदय पर्वतीं छेदोनि त्यांचे। पाडिले मणिमुकुट।।४८।। होतां पर्वतमहामार। अश्व सारथी रहंवर। करटभिन्न कुंजर। केले चकचूर रणरंगीं।।४९।। आम्ही श्रीरामाचे भद्रजाती। वानरवीर निजनांवाची ख्याती। रणीं गर्जगर्जोनि युद्ध करिती। आली समाप्ती राक्षसां।।५०।। अश्व मारिले अपरिमित। रणीं मोडले रथेंरथ। वीर मारिले असंख्यात। नेली भस्मांत गजसेना।।५१।। छत्र भंगूनि पडिलें धरणीं। शस्त्रें लोळती रणांगणीं। रणीं मारिले वीरश्रेणी। रुधिर अवनीं प्रवाहे।।५२।। वानर गगनीं राक्षस अवनीं। मारिले पर्वतपाषाणीं। वीरीं रणकावा घेवोनि। रणांगणीं वोसरले[8]।।५३।। वानरीं करितां महामार। मारिला राक्षसांचा भार। रणीं पळती

---

**शब्दार्थ :** १. अरिष्टे, संकटे, २. वज्रपात, ३. रक्त, ४. घोडे, ५. नाचू लागले, ६. मरू लागले, ७. घायाळ, ८. पळू लागले.

निशाचर। घायीं दुर्धर गांजिले ॥५४॥ रणीं मोडला राक्षसपक्ष। तेणें कोपला धूम्राक्ष। धनुर्ष्यीं साधोनियां लक्ष। मारावया विपक्ष[1] चालिला ॥५५॥

धूम्राक्षोऽथ धनुष्पाणिर्वानराद्रणमूर्धनि। हसन्विद्रावयामास विश्वस्तांश्शरवृष्टिभिः ॥२०॥
नाराचैराहताः केचित्केचिच्च शकलीकृताः। केचिद्विमथिता भूमौ रुधिरार्द्रा वनौकसः ॥२१॥
केचिद्विद्राविता नष्टाः संक्रुद्धै राक्षसैर्युद्धै। विभिन्नहृदयाः केचिदेके पार्श्वेन शायिताः ॥२२॥

धूम्राक्ष आणि हनुमान यांचे युद्ध : स्वयें धूम्राक्ष आपण। वाहोनियां धुनष्यबाण। वानरां करूं लागला कंदन। तीक्ष्णबाण विंधोनी ॥५६॥ जेंवी पर्वतीं पर्जन्यधारा। तेंवी बाणीं विंधिलें वानरां। एकां लागल्या रुधिरधारा। एक अंबरा उडाले ॥५७॥ एक सर्वांगां क्षतविक्षत। एक पडिले मूच्छित। सवेंचि उठोनि युद्ध करित। एक विवळत शरघातें ॥५८॥ एक रुधिरें थबथबित। तैसेचि वानर युद्ध करित। एकां बाण भेदले हृदयाआंत। श्रीरामा स्मरत महाबळी ॥५९॥ करितां रामनामस्मरण। स्वयें विरोनि जाती बाण। एकाचे वामपार्श्व विंधोन। वानरगण त्रासिले ॥६०॥ होतां देखोनि वानर त्रस्त। तेणें कोपला हनुमंत। रणीं खवळला कृतांत[2]। करावया घात धूम्राक्षा ॥६१॥

धूम्राक्षेणार्दितं सैन्यं व्यथितं प्रेक्ष्य मारुतिः। अभ्यवर्तत संक्रुद्धः प्रगृह्य महतीं शिलाम् ॥२३॥
क्रोधाद्द्विगुणरक्ताक्षः पितुस्तुल्यपराक्रमः। शिलां तां पातयामास धूम्राक्षस्य रथंप्रति ॥२४॥
आपतंतीं शिलां दृष्ट्वा गदामुद्यम्य संभ्रमात्। रथादाप्लुत्य वेगेन वसुधायां व्यतिष्ठत ॥२५॥
सा प्रमथ्य रथं तस्यनिपपात शिला भुवि। सचक्रं कूबरमुखं सध्वजं सशरासनम् ॥२६॥
भित्वा तु सरथं तस्य हनूमान्पवनात्मजः ॥२७॥

हनुमंत कोपेंकरीं। सप्तयोजन शिळा थोरी। घाली धूम्राक्षरथावरी। गिरागजरीं गर्जोनी ॥६२॥ जीवें मारावया धूम्राक्ष। क्रोधें जाला तो रक्ताक्ष। दृढ साधोनि अनुलक्ष। शत्रुपक्ष छेदावया ॥६३॥ हनुमंतें हाणीतली शिळा। न ढळे विंधितां बाणजाळा। न तुटे न फुटे शस्त्रमेळां। अस्त्रां सकळां अनिवार्य ॥६४॥ ऐसें जाणोनि निर्धारीं। धूम्राक्ष ते अवसरीं। गदा घेवोनियां करीं। पळाला दुरी लघुवेगें ॥६५॥ अश्व सारथी रथ कुंजर। ध्वजा पताका रथ चक्र। चाप शर छत्र चामर। केलें चकचूर शिळाघातें ॥६६॥ गदा घेवोनि करतळीं। धूम्राक्ष पळाला महाबळीं। तेणें हनुमंत कोपानळीं[3]। राक्षसदळीं मिसळला ॥६७॥ पित्या वायूचा आक्रम[4]। तैसाचि हनुमंती पराक्रम। करावया राक्षसांचें भस्म। स्वयें संग्राम मांडिला ॥६८॥ पुच्छें कवळोनि सैन्य समेळीं। शिर छेदित करतळीं। कपीची न तुटे रोमावळी। शस्त्रानुमेळीं राक्षसां ॥६९॥ द्रुमपाणी[5] आतुर्बळी। राक्षसां करीत रणरांगोळी। बोंब उठली नादावळी। राक्षसदळीं आकांत ॥७०॥ ऐकतां हनुमंताचें नांव। भेणें सांडूं पाहती जीव। तोचि संग्रामीं आला स्वयमेव। कल्पांतभय राक्षसां ॥७१॥ हनुमंतेंसीं रणरवंदळी। निशाचर कांपती चळचळीं। रागें देतां पैं आरोळी। दांतखिळी राक्षसां ॥७२॥ फोडोनी राक्षसांची फळी। आला धूम्राक्षाजवळी। तोही राक्षस आतुर्बळी। युद्धानुमेळीं खवळला ॥७३॥

विद्राव्य राक्षसानीकं हनूमान्पवनात्मजः। गिरिशृंगं तु संगृह्य धूम्राक्षं व्यद्रवद्बली ॥२८॥
तमापतंतं धूम्राक्षो गदामुद्यम्य वीर्यवान्। विनर्दंतं हनूमंतं गदां तां बहुकंटकाम् ॥२९॥
पातयामास धूम्राक्षः स्तनदेशे हनूमतः। स कपिर्मारुतवलस्तं प्रहारमचिंतयन् ॥३०॥
धूम्राक्षस्य शिरोमध्ये गिरिशृंगमपातयत्। स विह्वलितसर्वांगो गिरिशृंगेण पोथितः ॥३१॥

शब्दार्थ : १. शत्रू, २. यमासारखा, ३. क्रोधाग्नीने, ४. पराक्रम, ५. हातात वृक्ष घेतलेला.

पपात सहसा भूमौ विशीर्ण इव पर्वतः। निहतं राक्षसं दृष्ट्वा हतशेषा निशाचराः॥३२॥
त्रस्ताः प्रविविशुर्लंकां वध्यमाना वनौकसैः॥३३॥

करोनि सैन्यासी रवंदळी। धूम्राक्ष मारावया महाबळी। शिखर घेवोनि करतळीं। आला तत्काळी हनुमंत॥७४॥ हनुमान आला देखोनि जवळीं। धूम्राक्ष झाला क्रोधनळीं। गदाघातें हृदयकमळीं। मरणानुमेळीं हाणितला॥७५॥ घावो लागला हृदयकमळीं। गदा होवोनि गेली रांगोळी। धूम्राक्ष तये काळीं। स्वयें न्याहाळी विस्मित॥७६॥ शक्तीवरदाचे उद्रेक। तेचि गदेसी कंटक। वरदगदा सकंटक। तिसी अंतक धाकत॥७७॥ वरदगदा अति वरिष्ठ। घायें मारावया मर्कट। शेखीं गदाच केली पीठ। बळें उद्भट वानर॥७८॥ ऐसें धूम्राक्ष जंव विचारी। तंव हनुमंतें शिळा शिखरी। दृढ टाकिली मस्तकावरी। जातां चाचरी[1] लवंडला॥७९॥

धूम्राक्षाचा वध व राक्षसांचे पलायन : धूम्राक्ष पडतांचि धरणीं। पिवों न मागतां पाणी। प्राण गेला तत्क्षणीं। रणभंगाणी राक्षसां॥८०॥ रणीं पडलियां मुख्य धुरी। सैन्यसंभार निशाचर। मारितां उरले जे वीर। अति सत्वर पळाले॥८१॥ एक हुंबत हुंबत। एक कण्हत कुंथत। एक अतिशयेंसीं थिकत[2]। लंकेआंत पैं आले॥८२॥ रणीं गौरविलें वीरां। ओढिती अंत्रमाळा[3] शिरा। एक वाहती रुधिरधारा। एकांचे उदरा नखघात॥८३॥ वानरवीर जगजेठी। न लागती पळत्यापाठी। घायाळ गेले लंकात्रिकूटीं। बोंब उठी राक्षसा॥८४॥ वानरवीर रणप्रवीण। केलें राक्षसा रणकंदन। हनुमंतें पैं आपण। घेतला प्राण धूम्राक्षाचा॥८५॥

धूम्राक्ष वधाने रावणाचा संताप व अकंपनाची योजना : धूम्राक्षगदावरदपात। तो हनुमंतें केला व्यर्थ। हनुमंतें केला शिखरघात। तेणें प्राणांत राक्षसां॥८६॥ ऐसें ऐकोनि दशानन। स्वयें जाला क्रोधायमान। पाचारोनि अकंपन। धाडिला आपण संग्रामा॥८७॥

वानरसैन्यात रामनाम - गर्जना : येरीकडे राम कटकांत[4]। वानर रामनामें गर्जत। आम्ही श्रीरामाचे दूत। विजयान्वित सर्वदा॥८८॥ रामनामाच्या स्मरणीं। वानरां विजय अनुदिनीं। धाकें अपेश गेलें निमोनी। जागृतीं स्वप्नीं दिसेना॥८९॥ स्मरणापासीं विजयवृत्ती। स्मरणापासीं यश कीर्ती। स्मरणापासीं ब्रह्मप्राप्ती। हे विख्याती स्मरणाची॥९०॥ विस्मरणें अपेशप्राप्ती। विस्मरणीं नित्य अपकीर्ती। विस्मरण स्वयें पापमूर्ती। नरकप्राप्ती विस्मरणें॥९१॥ एका जनार्दना शरण। कथा रम्य रामायण। हनुमंतें स्वयें आपण। केलें निर्वाण[5] धूम्राक्षा॥९२॥ लागला हनुमंताचा घात। कोटि जन्मांचा मरणावर्त[6]। चुकोनि जाला नित्यमुक्त। भाग्यवंत धूम्राक्ष॥९३॥ एका जनार्दना शरण। श्रीरामदृष्टीपुढें मरण। बाण भेदितां ब्रह्म पूर्ण। समाधिचिद्धन संग्राम॥९४॥ येथें मूर्च्छनेचा जो बोध। तो तंव केवळ आनंदकंद[7]। एका जनार्दनीं उद्बोध[8]। परमानंद संग्रामीं॥९५॥ जो अहंममतेसीं करी संग्राम। तो निधडा[9] योद्धा परम। त्यासीं साह्य सदा श्रीराम। स्वयमेव ब्रह्म तो होय॥९६॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां धूम्राक्षवधो नाम चतुर्दशोऽध्यायः॥१४॥ ओंव्या॥९६॥ श्लोक॥३३॥ एवं॥१२९॥

---

शब्दार्थ : १. झोक जाऊन, २. चरफडत, ३. आंतडीं, ४. रामाच्या सैन्यांत, ५. मोक्ष, ६. मरणक्रम, ७. आनंदाचे मूळ, आश्रयस्थान, ८. ज्ञान, ९. छातीचा.

# अध्याय पंधरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## अकंपन व वज्रदंष्ट्र यांचा वध

धूम्राक्षं निहतं श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः। क्रोधेन महताविष्टो निःश्वसन्नुरगो यथा॥१॥
दीर्घमुष्णं च निःश्वस्य क्रोधेन कलुषीकृतः। अब्रवीद्राक्षसं क्रूरं वज्रदंष्ट्रं महाबलम्॥२॥
गच्छ त्वं वीर निर्याहि राक्षसैः परिवारितः। जहि दाशरथिं रामं सुग्रीवं वानरैः सह॥३॥
तथेत्युक्त्वा द्रुततरं मायावी राक्षसेश्वरः। निर्जगाम बलैः सार्धं बहुभिः परिवारितः॥४॥

धूम्राक्ष राक्षस बळवंत। त्याचा हनुमंतें केला घात। तें ऐकोनि लंकानाथ। क्रोधान्वित अति दुःखें॥१॥ धूम्राक्षाचें युद्धमरण। ऐकोनि स्वयें रावण। सर्पप्राय[1] फुंपावे पूर्ण। क्रोधें प्राण त्यजूं पाहे॥२॥

रावणाने वज्रदंष्ट्रास पाठविले : धीर वीर महाशूर। वज्रदंष्ट्र निशाचर। त्यासी सांगे दशशिर। युद्धा सत्वर निघावें॥३॥ रणा जावोनि आपण। मारावे राम लक्ष्मण। अंगद सुग्रीव कपिगण। हनुमान साधून[2] धरावा॥४॥ राक्षसांचा दुर्धर भार। सबळ सेनेसीं सपरिवार। सहराम मारावे वानर। लहान थोर शोधूनी॥५॥

वज्रदंष्ट्राचे ससैन्य प्रयाण : ऐकोनि रावणाचें वचन। वज्रदंष्ट्र उल्लासोन। वंदोनियां दशानन। निघे आपण संग्रामा॥६॥ मुकुट कुंडलें बाहुभूषणें। केयूरान्वित करकंकणें। अंगत्राण शिरस्त्राणें। करत्राणें गोधांगुळी[3]॥७॥ वज्रदंष्ट्र वीर दारुण। लेवोनियां रणाभरण। सज्जोनियां धनुष्यबाण। निघे आपण संग्रामा॥८॥ वाजी पदाती खर उष्ट्र। वाहनारूढ निशाचर। रथ ध्वजी मत्त कुंजर। सैन्यसंभार सज्जूनी॥९॥ विचित्र पताका कडकडाट। रथ चालिले धडधडाट। विचित्रध्वज अति वरिष्ठ। वीर उद्भट चालिले॥१०॥ हेमाभरणीं सालंकृत। ध्वजपताकीं रथ शोभत। वज्रदंष्ट्र बैसला तेथ। दक्षिणावर्त साधूनी॥११॥ गदापरिघबाणयुत। खड्गतोमरशूळहस्त। एक वीर मुशलान्वित। एक झेलित मुद्गल॥१२॥ वोडणखर्गें महावीर। एक पायींचे धनुर्धर। पायदळाचे मोगर। वीर झुंजार गर्जती॥१३॥ वीरांअंगीं आंगवण। कांसा घातल्या नानावरण। अंगप्रत्यंगीं रणाभरण। उल्लास पूर्ण युद्धाचा॥१४॥ दोहीं बाहीं गजथाट। गजयोद्धे वीर उद्भट। शूळ त्रिशूळ तोमर निकट। गजघट[4] चालविती॥१५॥ गजयुद्धाच्या व्युत्पत्ती। त्या दाविती गतिविगति। परसैन्या लाविती ख्याती। दाविती युद्धीं रणमारें॥१६॥ अश्वगजरथघडघडाट। वीरीं वीरांचा कडकडाट। दक्षिणद्वारें सैन्यसंघात। वज्रदंष्ट्र निघाला॥१७॥

निःसृतो दक्षिणद्वारादंगदो यत्र यूथपः। तेषां निष्क्रममाणानामशुभं समजायत॥५॥

अंगद यूथप[5] दक्षिणद्वारीं। सैन्य निघतांचि बाहेरी। तेथें जाली नवलपरी। निशाचरीं अशुभार्थ॥१८॥ उलूक तळपोनि अंबरीं। बैसला वज्रदंष्ट्रावरी। भालू भुंकती उंच स्वरीं। निशाचरीं अशुभार्थ॥१९॥ वज्रदंष्ट्र वीर जेठी। अपशकून नाणी दृष्टीं। युद्धा निघे उठाउठीं। कडकडाटीं ससैन्य॥२०॥

वानर राक्षस सैन्याचे युद्ध : अंगदाचें वानरवीर। युद्धा मिसळले सत्वर। राक्षस हाणिती हतियेर। बहुप्रकारें वानरीं॥२१॥ मृदंग शंख भेरी गहन। काहळा वीणा आणि विषाण।

शब्दार्थ : १. सर्पासारखा, २. पकडून, ३. धनुष्याच्या दोरीचा घट्टा पडू नये म्हणून हातात घालितात ते, ४. गजसमूह, ५. सेनापती

रणीं त्राहाटिलें निशाण। आलें स्फुरण उभयदळीं ॥२२॥ राक्षस हाणिती हतियेर। घाय चुकविती वानर। बाहुबळें निशाचर। रणीं सत्वर उपटिती ॥२३॥ वानर आणि निशाचर। युद्धा मिसळले दुर्धर। घाय हाणिती निष्ठुर। येरयेरां नोकोनी[1] ॥२४॥ शस्त्रें हाणितां निशाचर। गगनीं उसळती वानर। घाय टाळूनि कपींद्र। करिती विचित्र तें ऐका ॥२५॥ धनुष्याचीं तोडिती शितें[2]। आंसडोनि घेती शस्त्रांतें। निःशस्त्र करोनि राक्षसांतें। मुष्टिघातें मारिती ॥२६॥ बाहुबळें महावीर। झोंबी घेताती दुर्धर। मल्लयुद्धींचा प्रकार। चमत्कार दाविती ॥२७॥ मुष्टिघात तळवेघात। चरणघात बाहुघात। वानर खवळले रणांत। करिती घात राक्षसां ॥२८॥ गुडघ्यां खांदें कोंपरीं। तडवे हाणिती परस्परीं। धडका हाणोनियां उरीं। महामारी राक्षसां ॥२९॥ रणीं वानर वृक्षहस्त। रथी सारथी साश्वरथ। अवघ्यां करोनि एकघात। वीर कुंथत पाडिले ॥३०॥ वानर गगनीं उसळोन। शिळा पर्वत पाषाण। टाकोनियां करिती चूर्ण। रण कंदन राक्षसां ॥३१॥ भग्नजानु भग्नकटी। वीर पाडिले कोट्यनुकोटी। वज्रदंष्ट्रें देखोनि दृष्टी। रणसंकटीं क्षोभला ॥३२॥ वानरीं मारिले निशाचर। वाहती रुधिराचे पूर। देखोनि वज्रदंष्ट्र वीर। रथ सत्वर प्रेरिला ॥३३॥ स्वयें वज्रदंष्ट्र आपण। सज्जोनियां धनुष्यबाण। साटोपोनि रणांगण। वानर सैन्य विंधिलें ॥३४॥ रणोन्मत्त अति दुर्धर। बाण न गणिती वानर। तिहीं वेढिला वज्रदंष्ट्र। शिळा शिखरदुमपाणि ॥३५॥ रणीं नाटोपती वानर। चिंतानिमग्न[3] वज्रदंष्ट्र। सर्वसंहारक जें अस्त्र। अति दुर्धर योजिलें ॥३६॥

**वज्रदंष्ट्राच्या सर्वसंहारक अस्त्राचा प्रभाव :** तो बळवंत अस्त्रवेत्ता। करावया वानरांच्या घाता। होय अस्त्रातें सोडिता। साटोपता समंत्र ॥३७॥ अस्त्रविद्येचें बळ गाढें। मागील मागें पुढील पुढें। वानरां भेटलें कुऱ्हाडें। चहूंकडे रणमार ॥३८॥ अस्त्रविद्येचिया बाणीं। वानर पाडिले रणांगणीं। एक उफळतां गगनीं। पाडी विंधोनी साटोपें ॥३९॥ जेंवी पाहोनि प्रळयांत। अंतक[4] करी जीवघात। तेंवी वानरां[5] रणावर्त। असे करित वज्रदंष्ट्र ॥४०॥ देखोनि वानरांच्या भारा। क्रोधें कांपतसे थरथरां। सज्जोनियां बाणधारा। रणीं वानरां निवटित ॥४१॥ अस्त्रविद्येचिये बाणीं। वानरसेना भंगली रणीं। अंगदें देखिली दुरोनी। आला गर्जोनी साटोपें ॥४२॥ भंगली देखोनी कपिसेना। अंगद कोपला चौगुणा[6]। वृक्ष उपटोनियां जाणा। राक्षससेना निर्दाळी ॥४३॥

**अंगदाचा आवेश व राक्षसांची दाणादाण :** सिंह देखतांचि दृष्टीं। मृगें पळती बारा वाटीं। अंगदवृक्षघायासाठीं। राक्षसकोटी निमताती ॥४४॥ बळें हाणितां वृक्षघातीं। राक्षसशिरें पडती क्षितीं[7]। रुधिराचे पूर वाहती। अंगदें ख्यातीं लाविली ॥४५॥ जे जे युद्धा संमुख येती। वृक्ष हाणितां रणीं पडती। वृक्ष घेवोनियां हातीं। अति आघातीं मारित ॥४६॥ जेंवी प्रळयकाळींचा वन्ही। वाढे उदक निर्दाळूनी। तेंवी राक्षस निर्दाळूनी। अंगद रणीं खवळला ॥४७॥ मूळ छेदल्या वृक्ष लवंडती[8]। तेंवी राक्षस पाडोनि क्षितीं। गज रथ अश्व सारथी। वृक्षघातीं शतचूर्ण ॥४८॥ भंगिले रथ ध्वज विचित्र। युद्धें मारिले छत्रधार। छत्रभंगें अलंकार। हार केयूर[9] लोळती ॥४९॥ मुकुट कुंडले सशिरें। बाहु लोळती सर्पाकारें। करकंकणें केयुरें। शस्त्रे वस्त्रें लोळती ॥५०॥ लोळती वस्त्रें अलंकार। तेणें शोभे भूमि विचित्र। शरत्काळीं जेंवी नक्षत्र। निशिं सचंद्र शोभत ॥५१॥ रणीं मारितां निशाचर। वाहती रुधिरांचे[10] पूर। तेणें भूमि भयंकर। अति दुस्तर भासत ॥५२॥ तुटोनि दूर गेलीं शिरें। अरुंडें लोळती शरीरें। गजकलेवरें महाथोरें। अंगदवीरें पाडिलीं ॥५३॥

---

शब्दार्थ : १. धिक्कारून, २. दोऱ्या, ३. चिंतेमध्ये- निमग्न बुडालेला, ४. काळ, यम. ५. रणरूपी भोवरा, ६. चौपट, ७. जमिनीवर, ८. कोसळतात, ९. बाहुभूषणे, १०. रक्ताचे.

अंगदाचा पराक्रम : देखोनि अंगदाच्या मारा। पळ सुटला निशाचरां। अवघीं कांपती थरथरां। धीर वीरां न धरवे ॥५४॥ लागतां वायूचा आघात। मेघमंडळ हताहत[१]। तेंवी राक्षस समस्त। रणीं पळत अति धाकें ॥५५॥ राक्षसांचें सबळ दळ। अंगदें मर्दिलें सकळ। वज्रदंष्ट्रा महाबळ। कोपें प्रबळ चालिला ॥५६॥ इंद्रचापसमदुर्धर। विस्फारोनि[२] धनुष्य घोर। नादें कांपे चराचर। महावीर वज्रदंष्ट्र ॥५७॥ इंद्रचापीं नाद दुर्धर। तैसा धनुर्ष्यीं टणत्कार। लक्षोनि वानरांचा भार[३]। शर दुस्तर सोडिले ॥५८॥ वज्रदंष्ट्रासवें शूर। निधडे भरंवशाचे वीर। रथीं बैसोनि अपार। युद्धा दुर्धर मिसळले ॥५९॥ युद्धा मिसळतां निशाचर। कपिसेना दुर्धर वीर। युद्धा खवळले वानर। साश्व रहंवर उपडिती ॥६०॥ वानरसैन्याचिया कोटी। रणीं पावल्या उठाउठीं। राक्षसांच्या झोंटमिठी। रणीं सनिष्ठीं भिडती ॥६१॥ राक्षसांचे निधडे वीर। त्याहून बळवंत वानर। युद्ध करिती घोरांदर। योद्धे दुर्धर पाडोनी ॥६२॥ राक्षस भिडती सर्वांगें। वानर न सरतीच मागें। पाय हाणितां पैं रागें। करिती अष्टांगें शतचूर्ण ॥६३॥ बाणशूळत्रिशूळ घात। वृक्ष शिळां गिरि पर्वत। परस्परें घाय हाणित। रुधिरोक्षित[४] महावीर ॥६४॥ अदट दादुर्गी वानरें। राक्षसांची छेदिती शिरें। बाहुभंगे निशाचरें। अवनीं[५] रुधिरें[६] वाहती ॥६५॥ वानर रणीं पडतां जाण। लाविती श्रीरामचरणरेण। तेणें घाय कानपोन[७]। उठती गर्जोन संग्रामीं ॥६६॥ वानर वर्षती पर्वत। तेणें शस्त्रें चूर होत। राक्षस वीर पडिले बहुत। पर्वतपातमहामारें ॥६७॥ शिळाशिखरपर्वतपात। तेणें राक्षसां प्राणांत। बोंब उठली सैन्यांत। रणकंदनार्थ राक्षसां ॥६८॥ रणीं पडले अति दुर्धर। काक बक श्येन घार। वृक[८] जंबुक[९] श्वान सूकर। मांस रुधिर भक्षिती ॥६९॥ शिरें गेलीं पैं तुटोनी। कबंधें धांवती रणीं। भूतें नाचती गर्जोनी। घेती धणीं[१०] मांसाची ॥७०॥ राक्षसांचे भुजाभार। तुटोनि पडिले कर शिर। तेणें रणभूमि भयंकर। अति दुर्धर भासत ॥७१॥ युद्धीं खवळोनी वानर। रणीं पाडिले निशाचर। निशाचरीं करोनि मार। रणीं वानर पाडिले ॥७२॥ वानर पडतां निर्वाण[११] झुंजें। सवेंचि उठती रामपदरजें। राक्षस पडती युद्धव्याजें। रणसमाजें प्राणांत ॥७३॥ श्रीरामबळें वनचर। रणीं उद्भट वानरवीर। धाकें पळती निशाचर। राक्षसभार भंगले ॥७४॥ वानरांच्या रणसंत्रासीं। भय घेवोनि राक्षसीं। वज्रदंष्ट्राचे पाठीसीं। चळकापेंसीं निघाले ॥७५॥ वज्रदंष्ट्रा सांगती सकळ। वानरांचे प्रबळ बळ। तुम्ही येथोनि शीघ्र काढा पळ। शिळा कपाळ भेदिती ॥७६॥ पर्वतांच्या घायें जाण। शस्त्रें तितकीं होती चूर्ण। आडवें न चले वोडण। वृथा प्राण कां देतां ॥७७॥

**स्वबलस्य च घातेन अंगदस्य बलेन च। राक्षसः क्रोधमाविष्टो वज्रदंष्ट्रो महाबलः ॥६॥**
**विस्फार्य च धुनर्घोरं शक्राशनिसमप्रभम्। वानराणामनीकानि प्रकिरन्शरवृष्टिभिः ॥७॥**

वज्रदंष्ट्राचा कोपयुक्त प्रतिकार : राक्षसांचें दीन वदन। सैन्य भंगलें देखोन। वज्रदंष्ट्र कोपायमान। धनुष्यबाण सज्जिले ॥७८॥ राक्षसांचें रणमर्दन। वानरीं केलें कंदन। तें वज्रदंष्ट्रें देखोन। ताम्रनयन क्षोभला ॥७९॥ धनुष्य घेवोनिया जाण। कंकपत्री सतेज बाण। करीं वानरां विदारण। खोंचोनि बाण सर्वांगीं ॥८०॥ वृक्ष शिळा शिखरें पर्वत। बाणीं तोडिले समस्त। वानर पाडिले बहुत। क्षत विक्षत शरघातें ॥८१॥ बाणलाघवी विद्या पूर्ण। सात पांच नव जण। घायें पाडी आठ जण। केलें कंदन[१२] वानरां ॥८२॥ घायीं अडकले असतां शर। संमुख भिडती वानर। रामनामें बळ थोर। वज्रदंष्ट्र विस्मित ॥८३॥ देखोनि बाणमहामार।

शब्दार्थ : १. वितळते, २. टणत्कार करून, ३. सैन्य, ४. रक्ताने माखलेले, ५. पृथ्वीवर, ६. रक्त, ७. नाहीसे होऊन, ८ लांडगे, ९. कोल्हे, १०. तृप्ती, ११. निकराच्या, १२. नाश.

रणीं भंगले वानर। अंगदापासीं सत्वर। आले समग्र ठाकोनी ॥८४॥ जेंवी झाल्या व्यसन[1] प्राप्त। पित्यापासीं ये अपत्य। तेंवीं अंगदापासीं त्वरित। आले धांवत वानर ॥८५॥ मोडलीं वानरांची सेना। वाळिसुतें[2] देखोनि नयना। कोंप आला चौगुणां। घ्यावया प्राणा तयाच्या ॥८६॥ अंगद क्रोधें ताम्राक्ष[3]। येवोनि वज्रदंष्ट्रासंमुख। पुन:पुन्हा पाहोनि मुख। मारूं नि:शंक चालिला ॥८७॥ निशाचर मज मारिती। हें भय नाहीं अंगदा चित्तीं। करावया राक्षसांची शांती। भद्रजाती खवळला ॥८८॥ देखोनि अंगद महावीर। शिष्टाईचा हा वानर। येणें गांजिला दशशिर। निशाचर कांपती ॥८९॥

वज्रदंष्ट्राचे व अंगदाचे युद्ध : देखोनियां वाळिकुमर। खळबळिला राक्षसभार। तेव्हा अंगदासमोर। वज्रदंष्ट्र स्वयें आला ॥९०॥ मदोन्मत्त गज केसरी। दोघे भिडती तैशियापरी। घाय हाणिती नाना कुसरीं। शिरीं उदरीं तळपोनी ॥९१॥ वज्रदंष्ट्रें धांवोनी। घाय हाणितां पडला अवनीं। अंगद उसळला गगनीं। उडी टाकोनी मारावया ॥९२॥ वज्रदंष्ट्र स्वयें आपण। वर्मस्थान लक्षोन। वर्षे शतसहस्र बाण। घ्यावया प्राण अंगदाचा ॥९३॥ अंगद बाणें रुधिरोक्षित[4]। रणभैरव रणोन्मत्त। तैसा रणरंगीं डुल्लत। करावया घात राक्षसां ॥९४॥ वज्रदंष्ट्राचे जे बाण। अंगदासीं तृणासमान। त्याचा घ्यावयासी प्राण। आला गर्जोन साटोपें ॥९५॥ त्याचा करावया चूर। सहस्रशाखांचा तरुवर। रागें उपटोनि दुर्धर। रणीं सत्वर सोडिला ॥९६॥ आलें देखोनियां झाड। राक्षसां थोर हडबड। घायें करी हो निवाड। हाडेंहाड फोडूनी ॥९७॥ हडबडिलें राक्षससैन्य। वज्रदंष्ट्र सावधान। कैसें केलें रणकंदन। निवारण वृक्षाचें ॥९८॥ देखोनि वृक्षाचें पतन। वज्रदंष्ट्र सावधान। गदा साटोपें घेऊन। रथावरून उडाला ॥९९॥ वज्रदंष्ट्र महाबळी॥ गदाघातें वृक्ष निर्दळी। छेदोनि पाडिला भूतळीं। पिटिली टाळी राक्षसीं ॥१००॥

समापतंतं तं दृष्ट्वा रथादाप्लुत्य वीर्यवान् । गदापाणिरसंभ्रांतः पृथिव्यां समतिष्ठत ॥८॥
अंगदेन शिला क्षिप्ता गत्वा तु रणमूर्धनि । वज्रदंष्ट्रस्य शिरसि पातयामास वानरः ॥९॥

अंगदाचा वज्रदंष्ट्रावर शिलाघात : अंगद वीर तेचि काळीं। उडोनियां अंतराळीं। दीर्घ घेवोनिया शिळी। घाली कपाळीं वज्रदंष्ट्रा ॥१॥ श्लाघोनि जंव बैसला रथांवरी। तंव शिळा बैसे येवोनि शिरीं। कासावीस होत चांचरी। कष्टेंकरीं पळाला ॥२॥ शिळा पडतां रथावरी। रथ सारथी शस्त्रसामग्री। सचक्र साटा[5] अंक[6] धुरी। केली चकचुरी ध्वजेंसीं ॥३॥ शिळेतळीं निजशरीर। चुकवोनि वांचला वज्रदंष्ट्र। तेणें कोपला वानर। पर्वत थोर उचलिला ॥४॥ नाना वृक्ष सुशोभित। उपटिला उचलोनि पर्वत। वज्रदंष्ट्रावरी घालित। क्रोधान्वित अंगद ॥५॥ घायापाठीं घायासी। येतां राक्षस कासाविसी। निवारण नाठवे त्यासी। तंव पर्वत शिर्सीं[7] वाजला ॥६॥ पर्वत पडतांचि सबळ। त्याचे फुटोनियां कपाळ। जाला अशुद्धें[8] बंबाळ। मूर्च्छा तत्काळ त्या आली ॥७॥ गदा टेंकोनि दोही हातीं। मूर्च्छापन्न पडला क्षितीं। मुहूर्त एक मूढमती। कांहीं स्फूर्ति स्फुरेना ॥८॥ वज्रदंष्ट्र पडतां अवनीं। बोंब उठली राक्षससेनीं। वानरनाचती रणांगणीं। पाडिला रणीं वज्रदंष्ट्र ॥९॥ उत्साह आणि आकांत। दोहीं दळांमाजी होत। मूर्च्छा भंगूनियां त्वरित। सावचित्त तो झाला ॥११०॥

वज्रदंष्ट्राचा गदाघात : वज्रदंष्ट्र सावध होत। गदा घेवोनि क्रोधान्वित। लक्षोनियां वाळिसुत। त्याच्या वधार्थ धाविन्नला ॥११॥ गदा घेवोनि क्रोधेंकरीं। अंगद ताडिला उरावरी। तो न

---

शब्दार्थ : १. संकट, २. अंगदाने, ३. क्रोधाने तांबडे डोळे झाले आहेत असा, ४. रक्ताने माखलेला, ५. रथाची साटी, ६. रथाचा आंस, ७. मस्तकी, ८. रक्ताने.

डंडळी[1] तिळभरी। जेंवी कां गिरि पर्जन्यें पैं ॥१२॥ डंडळेना वाळिसुत। वृथा गेला गदाघात। अंगदें उडोनि धरिला हात। आला प्राणांत करावया॥१३॥

मल्लयुद्ध मुष्टिघात : हाणों येतां मुष्टिघात। मल्लविद्या आकळित। वज्रदंष्ट्र क्रोधान्वित। अनुलक्षित मारावया॥१४॥ बळें निमटोनियां गळा। परस्परें लाविती कळा। लाता देतां हृदयकमळा। लागे डोळां अर्धचंद्री॥१५॥ सवेंचि होवोनि सावचत्ति। आघातघात उलटघात। चिकाट्या तळीं तळघात। घायें वर्मस्थ हाणिती॥१६॥ वानर आणि निशाचर। जाले घायीं अति जर्जर। सर्वांगीं वाहे रुधिर। येरां येर न ढळती॥१७॥ किंशुक[2] फुलले वसंतात। तैसे दोघे रणीं आरक्त। युद्धश्रमें श्रमभूत। तरी भिडत साटोपें॥१८॥ अंगदें उडोनि ते काळीं। सुशोभित पुष्पीं फळीं। वृक्ष उपडोनि समूळीं। रणकल्लोळीं पातला॥१९॥ अंगदाचें बळ वितंड। वृक्ष देखोनि प्रचंड। राक्षसाचें बळदंड। खंड विखंड हो सरलें॥१२०॥ वज्रदंष्ट्र सावचित्त[3]। वोडणखड्गा[4] घाली हात। वोपत्रिप तळप देत। करावया घात अंगदा॥२१॥ अर्धचंद्र दृढ वोढण। ज्वाळमाळारत्नभूषण। धडकधडकूं दे किराण[5]। दावी आंगवण वज्रदंष्ट्र॥२२॥ एक वोढणखड्गहस्त। दुजा वीर वृक्षहस्त। निर्वाणींचे[6] घाय देत। निजविजयार्थ साधावया॥२३॥ भैरव चर्ची सिंदूर। तैसे रक्तें आरक्त वीर। धांवती येरयेरांसमोर। घाय निष्ठुर हाणोनी॥२४॥ अंगदाचा वृक्षघात। राक्षसांचा खर्गघात। दोघे पडले मूर्च्छागत। सावचित्त संग्रामीं॥२५॥ संग्रामी अति भ्रांत। दोघे घायीं जर्जरित। रणीं पडले मूर्च्छित। तोही वृत्तांत अवधारा॥२६॥ दोघे वीर महाहठी। रणीं बैसले मेटीखुटीं[7]। घुर्मी[8] बाष्प दाटलें कंठीं। नेत्रवाटी बहु विकळ॥२७॥ अंगदवीर मूर्च्छेआंत। रामनामें सावचित्त। वज्रदंष्ट्राचा केला घात। निमेषांत तो ऐका॥२८॥ वृक्षघाय गेला व्यर्थ। तेणें अंगद क्रोधान्वित। सर्प जैसा दंडाहत। तैसा धांवत साटोपें॥२९॥ अंगद वीर निधडा जाण। वज्रदंष्ट्रासी सावधान। स्वयें करोनि आपण। केलें हनन गर्जोनी॥१३०॥

निर्मलेन सुघौतेन खड्गेनास्य महच्छिरः। जघान वज्रदंष्ट्रस्य वालिसूनुर्महाबलः॥१०॥

वज्रदंष्ट्राचा स्वतःच्याच खड्गाने घात : वज्रदंष्ट्राचें खर्ग थोर। अति निर्मळ सतेज धार। अंगदें हिरोनि सत्वर। छेदिलें शिर तयाचें॥३१॥ अंगद वीर अति विख्यात। त्याच्या शस्त्रें त्याचा घात। करोनियां मस्तकपात। रणीं गर्जत हरिनामें॥३२॥ अंगद वीर अति निधडा। धायें शिर उडविलें पुढां। अशुद्ध[9] वाहे भडभडां। केला नितोडा[10] राक्षसां॥३३॥ वज्रदंष्ट्राचा केला घात। राक्षससैन्य भयभीत। अवघे पळती भयान्वित। वानरीं अंत पुरविला॥३४॥ मुकुट कुंडलें शस्त्रास्त्रें। अनर्घ्य भूषणें विचित्रें। सांडोनि पळती निशाचरें। लंकाद्वारी आकांत॥३५॥

वज्रदंष्ट्र वधाने राक्षसांचा आकांत व वानर सैन्यात हर्ष : एक रडत एक पडत। एक अत्यंत चरफडत। एक पाणी पैं मागत। खुणा हातें दावूनी॥३६॥ एक हुंबतें हुंबतें। एक कुंथतें कण्हतें। एकाची लोंबतीं अंतें[11]। लंकेशातें निंदिती॥३७॥ चोरोनियां सीता सुंदरी। आम्हांसी केली महामारी। धाड आणिली लंकेवरी। होत बोहरी[12] राक्षसां॥३८॥ राक्षससैन्य समस्त। पळोनि गेलें लंकेआंत। विजयी जाला वाळिसुत। रघुनाथकृपेनें॥३९॥ मारोनियां वज्रदंष्ट्र। विजयी जाला वाळिकुमर। वानरांसी हर्ष थोर। सुखें निर्भर अंगद॥१४०॥ मारोनियां वृत्रासुर। शोभे जेंवी सुरेश्वर[13]। तैसा शोभे अंगद वीर। सपरिवार वानरीं॥४१॥ अंगदाचें सबळ बळ।

---

शब्दार्थ : १. घाबरेना, २. पळस, ३. सावध, ४. ढाल व तरवारीला, ५. उडी, ६. निकराचे, ७. ढोपरे टेकून, ८. आवेशाने, ९. रक्त, १०. नाश, ११. आतडी, १२. नाश, १३. इंद्र.

वानर वानिती सकळ।श्रीरामदर्शना प्रेमळ। आला निजदळसमवेत[१]॥४२॥ संमुख देखोनि रामचंद्र। अवघीं केला जयजयकार। श्रीरामनामाचा गजर। नमस्कार घातला॥४३॥ वंदोनियां रामचरण। अभिवंदिला लक्ष्मण। सुग्रीवासी लोटांगण। बिभीषण वंदिला॥४४॥ प्रेमें वंदिला हनुमंत। नळनीळादि जांबवंत। वानरसमुदाय समस्त। अभिवंदित अंगद॥४५॥ राजकुमर बळवंत। सत्त्वगुणी अति समर्थ। अंगद वीर विख्यात। स्वयेंवानीत श्रीराम॥४६॥ अंगदे केलें रणविंदान। झालें वज्रदंष्ट्रहनन। पुढें येईल अकंपन। तेंही रण अवधारा॥४७॥ सुग्रीव वीरें समराआंत। वज्रदंष्ट्राचा केला घात। हे ऐकोनि लंकानाथ। क्रोधान्वित स्वयें जाला॥४८॥

वज्रदंष्ट्रं हत श्रुत्वा वालिपुत्रेण रावणः। बलाध्यक्षमुवाचेदं कृतांजलिमुपस्थितम्॥११॥
शीघ्रं निर्यांतु दुर्धर्षा राक्षसा घोरदर्शनाः। अकंपनं पुरस्कृत्य सर्वशस्त्रास्त्रकोविदम्॥१२॥
ततो नानाप्रहरणा भीमाक्षा भीमदर्शनाः। निर्ययू राक्षसा मुख्या बलाध्यक्षप्रणोदिताः॥१३॥

रावणाचा क्रोध व अकंपनाची रणावर रवानगी : अति क्रोधें दशानन। पाचारोनी अकंपन। तूं तंव वीरपंचानन[२]। रणप्रवीण रणयोद्धा॥४९॥ सौमित्रेंसहित श्रीराम। रणीं मर्दून प्लवंगम[३]। माझे निढळींचा पुशीं घाम। प्रिय परम मज करी॥१५०॥ ऐकोनि रावणाचें वचन। गर्जिन्नला अकंपन। वानरेंसीं राम लक्ष्मण। न लागतां क्षण निवटीन॥५१॥ आलिया सुरासुरगण। मागें न सरें मी अकंपन। राम लक्ष्मण बापुडे कोण। वानर तृण मजपुढें॥५२॥ ज्याचे देखतां दशन[४]। भयानक अति दारुण। धाकेंचि वीर सांडी प्राण। अत्युग्र सैन्य सज्जिलें॥५३॥ ज्याचें देखतां विकट[५] वदन। सैन्य पडे मूर्च्छापन्न। ऐसें दुर्धर सज्जोनि सैन्य। अकंपन निघाला॥५४॥ कात्या त्रिशूळ तोमर। गदा मुद्गल परिघ घोर। झेलीत शस्त्रसंभार। निशाचर निघाले॥५५॥ अकंपनाअंगीं आंगवण। सबळ बळाचा गर्व पूर्ण। रावणें देवोनि सन्मान। करावया रण धाडिला॥५६॥

रथमास्थाय विपुलं तप्तकांचनभूषणम् । अकंपनस्तु तैर्घोरैराक्षसैः सह निर्ययौ॥१४॥
तस्य निर्धावमानस्य संरब्धस्य युयुत्सया। अकास्माद्दैन्यमागच्छद्धयानां रथवहिनाम्॥१५॥
प्रस्फुरन्नयनं चास्य सव्यं युद्धाभिकांक्षिणः। तानुत्पातानधःकृत्वा निर्जगाम निशाचरः॥१६॥

शस्त्रास्त्रीं रथ सज्जून। रथीं बैसला अकंपन। कवच कुंडलें तप्तकांचन। विजराजमान महावीर॥५७॥ अकंपन महावीर। स्वभावें क्रूर आणि अत्युग्र। घेवोनि निशाचरांचा भार[६]। युद्धा सत्वर निघाला॥५८॥

अकंपनास अपशकून : रथ चालतां घडघडाट। शुद्ध भूमिका मार्ग सपाट। चहूं वारुवां[७] वळली भेट। मारितांही साट न उठती॥५९॥ वारुवें दातीं धरली भोये। उठवितां न उठवी पाहें। अकंपनें धरिलें भये। करावें काये नाठवे॥१६०॥ संचित होतां मुख्य धुर[८]। अशुभें लवे वाम नेत्र। भयभीत निशाचर। दुश्चिन्हें थोर देखोनी॥६१॥ साटोप धरोनियां पोटीं। वारु उठवी जगजेठी। त्यांची थाप्टोनियां पाठी। रथ सन्निष्ठि[९] सज्जिला॥६२॥ वारु करोनि सुप्रसन्न। रथीं बैसला अकंपन। सवेग करितां रथाभिगमन। पुढें दुश्चिन्ह देखिलें॥६३॥ वृक जंबुक सिंह व्याघ्र। ऊर्ध्वमुख विवर्णस्वर[१०]। शब्द वदती अत्युग्र। पक्षीही क्रूर शब्द करिती॥६४॥ निधडा वीर अकंपन। शूर पुरुषार्थी पंचानन। उत्पात सांडिले हेळसून[११]। करावया रण निघाला॥६५॥ शंके देखोनि जो उत्पात। त्याचे अंगीं नाहीं पुरुषार्थ। जय न पवे तो युद्धांत। जो भयभीत अपशकुनें॥६६॥ अकंपन वीर उद्भट। करोनि वाढिवेचा नेट। रथ प्रेरिला घडघडाट। अति कडकडाट युद्धाचा॥६७॥

शब्दार्थ : १. आपल्या सर्व सेनेसह, २. वीरांमध्ये सिंहासारखा, ३. वानर, ४. दात, ५. भयंकर, ६. समुदाय, ७. घोड्यांना, ८. मुख्य सेनानी, ९. उत्साहांने, १०. भिन्न, शब्द करणारे, ११. कानाडोळा करून.

तस्य निर्यातमानस्य रक्षसः सह राक्षसैः। बभूव सुमहान्नादः क्षोभयन्निव सागरम्॥१७॥
तेन शब्देन वित्रस्ता वानराणां महाचमूः। द्रुमशैलप्रहाराणां योद्धं समवतिष्ठताम्॥१८॥
तेषां युद्धं महाघोरं बभूव कपिरक्षासाम्। रामरावणयोरर्थे समरे त्यक्तजीविनाम्॥१९॥
अन्योन्यं रजसा तेन कौशेयारुणपांडुना। संवृत्तं धूमधूम्रेण ददृशुस्ते रणाजिरम्॥२०॥
न ध्वजो न पताका वा चर्म वा तुरगोपि वा। आयुधं स्यंदनं वापि ददृशुस्तेन रेणुना॥२१॥

वानर आणि राक्षसांचा रणसंग्राम : वीरीं करोनि रणशृंगार। मुकुटकुंडलें कवच वीर। अकंपनासवें दुर्धर भार। निशाचर चालिले॥६८॥ सिंहनादें गिरागजर। गर्जत येतां राक्षसभार। तें देखोनि कपिकुंजर[१]। युद्धा सत्वर मिसळले॥६९॥ शिळा शिखरें वृक्ष पर्वत। वानर भिडती युद्धाआंत। घायें राक्षसां करिती घात। सैन्यकंदनार्थ मांडिला॥१७०॥ त्रिशुळ कात्या शक्ति तोमरे राक्षसें घेवोनि हतियारें। रणीं खोंचली वानरें। वाहत रुधिर भडभडां॥७१॥ रावणाच्या निजकार्यार्थ। राक्षसीं वेंचिता जीवित। वानरीं करोनि पर्वतघात। असंख्यात मारिले॥७२॥ वानरीं करोनि युद्ध निर्वाण। श्रीराम काजी वेंचितां प्राण। त्यांसी न बाधी जन्म मरण। नामस्मरण करितांचि॥७३॥ वानर घायीं होतां निर्बुज[२]। लाविती श्रीरामचरणरज। घाय पानपोन[३] होती नीरुज[४]। कपिसमाज गर्जती॥७४॥ करितां रामनामस्मरण। नामें वानरां बळ संपूर्ण। नामबळें करोनि कंदन। बळवाहन गर्जती॥७५॥ वीरां वानरां करितां रण। रणीं उठले रजःकण। रवि बिबेंसीं झांकती किरण। आपणाआपण न देखती॥७६॥ ध्वजपताकांसीं न दिसे रथ। अश्व सारथि वीर विख्यात। मुख्य अकंपन तटस्थ। सैन्य समस्त केंवी देखे॥७७॥ निशाचर देखती रातीं। ऐसी सर्वत्र वदंती[५]। तेही करोनि सामान्य शक्ती। देखणी स्थिति वानरां॥७८॥ श्रीराम दीप्तीची निजदीप्ती। श्रीराम स्वयें तेजोमूर्ती। त्याचेनि तेजें जुप्तती। देखणी शक्ती वानरां॥७९॥ वानरांअंगीं सिद्ध उड्डाण। त्यांवरी आलें देखणेपण। रणीं केले कंदन। सावधान अवधारा॥१८०॥

ऐतस्मिन्नंतरे वीरा वानराश्च महाबलाः। संरब्धाः परमं क्रुद्धाश्चक्रुर्यद्धमनुत्तमम्॥२२॥
ते मुष्टिभिर्महावेगा राक्षसानां चमूमुखे। कन्दनं सुमहच्चक्रुर्लीलया हरिपुंगवाः॥२३॥
शब्दश्च सुमहांस्तेषां नर्दतामभिधावताम्। श्रूयते तुमुलो युद्धे न रूपाणि चकाशिरे॥२४॥
तदा च रक्षोगणमुन्नदंतं संभ्रांतनागाश्वरथं विकृष्टम्।
महोदधेः पूरमिवानुरूपं निशाचराणां बलमाबभासे॥

राक्षस सैन्याची दैना : रणीं रज दाटलें दुर्धर। तये संधीं वानरवीर। राक्षसां केला दुर्धर मार। शिळाशिखर[६] द्रुमपाणी॥८१॥ निशाचरीं सूनी दृष्टी। वानरवीर वळोनि मुष्टी। मारिती राक्षसांच्या थाटी। रणीं सन्निष्ठीं गर्जोनि॥८२॥ कोपोनियां अति दुर्धर। रणीं खवळले वानर। करितां शिळाशिखरमार। निशाचर भंगले॥८३॥ वोडण खड्ग शूर दुर्धर। पर्वतघातें करिती चूर। वानरीं भंगिलीं हतियेरें। निशाचर मर्दूनी॥८४॥ रणीं राक्षसां होतां घात। त्यांसी प्रतिकूळ महावात। तोच वानरां अनुकूळ होत। श्रीरघुनाथाचेनि साह्यें॥८५॥ असुर वानर करितां रण। उठले होते रजःकण। अशुद्धें वाहतां रणांगण। रज दारुण उपशमलें॥८६॥ बळें उन्नद्ध राक्षसभार। वानरीं करितां पर्वतमार। रथाश्व गज सारथी वीर। निशाचर कळकळती॥८७॥ मंदरें[७] मंथितां सागर। क्षोभला गर्जे अति दुर्धर। कपि मथितां राक्षसभार। निशाचर कळकळती॥८८॥ भंगले देखोनि रक्षोगण[८]। तीव्र कोपला अकंपन। धनुर्ष्यी सज्जूनियां बाण। सांगे आपण सारथ्या॥८९॥ मर्दूनि राक्षसांचे भार। गर्जत उभे वानरवीर। शीघ्र प्रेरीं रहंवर[९]। कपिकुंजर वधावया॥९०॥

शब्दार्थ : १. वानरश्रेष्ठ कुंजर = हत्ती, २. व्याकुळ, ३. भरून येऊन, ४. व्यथारहित, निरोगी, ५. बोलणे, ६. शिळा, शिखरे, वृक्ष हातात घेवून, ७. मंदरनामक पर्वताने, ८. राक्षससमूह, ९. रथ.

तत् दृष्ट्वा सुमहत्कर्म कृतं वानरसत्तमैः। क्रोधमाहारयामास युधि तीव्रमकंपनः ॥२६॥
दृष्ट्वा तत्कर्म शत्रूणां सारथिं वाक्यमब्रवीत् । तत्रैव त्वरितं याहि सारथे यत्र वानराः ॥२७॥
एते हि बलिनो घ्नन्ति सुबहून्राक्षसान्रणे। एतान्निहन्तुमिच्छामि समरश्लाघिनो ह्यहम् ॥२८॥
ततः प्रजविताश्वेन रथेन रथिनां वरः। हरीनभ्यहनत्क्रोधात्किरन्बाणानकंपनः ॥२९॥
न शेकुर्वानराः स्थातुं किं पुनर्योद्धुमाहवे। अकंपनशरैर्भग्ना दुद्रुवुः सर्ववानराः ॥३०॥

अकंपनाच्या बाणवृष्टीने वानरसैन्याची दैन्यावस्था : ऐकोनि अकंपनवचन। सारथियें रथ प्रेरून। जेथें वानर करिती रण। तेथें आपणा आणिला ॥९१॥ अकंपन महावीर। बाणीं व्यापिलें अंबर[1]। उडोनि जातां पैं वानर। केला मार शरघातें ॥९२॥ शिळा शिखरें द्रुम पाषाण। शराग्रें करोनि शतचूर्ण। सपिच्छी विंधोनियां बाण। वानर सैन्य त्रासिलें ॥९३॥ वाम सव्य दशदिशीं। निघों जातां वानरांसी। बाण भेदिती सपिच्छी। रणभूमीसीं राहवेना ॥९४॥ जैसी पर्जन्याची वृष्टी। त्याहून सवेग शरसुटी[2]। वानर बाणीं होवोनि हिंपुटी[3]। उठाउठीं पळाले ॥९५॥ रावणाच्या कटकाआंत। अकंपन वीर विख्यात। कायसी वानरांची मात। रणीं रघुनाथ मारीन ॥९६॥ रणीं उभा अकंपन। गर्जतसे अति श्लोघान[4]। पळतां देखोनि वानरगण। हनुमान आपण चालिला ॥९७॥ रामनामें स्वयें गर्जत। वानरां नाभीकार[5] देत। करावया अकंपनाचा घात। आला हनुमंत साटोपें ॥९८॥

समीक्ष्य हनुमान्ज्ञातीनुपतस्थे महाबलः। तं महाप्लवंगं दृष्ट्वा सर्वे ते प्लवगर्षभाः ॥३१॥
समेत्य समरे वीराः सहिताः पर्यवारयन्। अकंपनस्तु शैलाभं हनूमन्तमवस्थितम् ॥३२॥
महेंद्र इव धाराभिः शरैरभिववर्ष ह। अचिंतयित्वा बाणौघान्शरीरे पतितान्कपिः ॥३३॥
अकंपनवधार्थाय मनो दध्रे महाबलः। शालमुत्पाटयामास गिरिशृंगमिव स्थितम् ॥ ३४॥
समुद्यम्य महाशालं भ्रामयामास मारुतिः। भ्रामयन्त स चिच्छेद शरैः शालमकम्पनः ॥३५॥

हनुमान व अकंपनाचे युद्ध : येतां देखोनि हनुमंत। पळते वानर समस्त। स्वयें परतले युद्धार्थ। बळोन्मत्त हनुमंत ॥९९॥ मेरुशिखरासमान। हनुमान आला देखोन। अकंपन कंपायमान। दुर्धर विघ्न मज आलें ॥२००॥ राक्षसांचा कंदकुदळ। मुख्य हनुमान अतिबळ। यासीं करोनि रणकल्लोळ। गोळांगूळ[6] मारीन ॥१॥ आजि मरणें कां मारणें। ऐसें निर्वाणयुद्ध[7] करणें। रणीं गर्जोन सत्राणें। निर्वाणबाणें[8] विंधित ॥२॥ जेंवी मेरुच्या शिखरा। मेघ वर्षती मुसळधारा। तैसे बाण पैं कपींद्रा। विंधी वानरां सर्वांगीं ॥३॥ अकंपनाची शरसुटी। हनुमंतासीं पुष्पवृष्टी। बाणांतें न गणी जगजेठी। शंका पोटीं असेना ॥४॥ गिरिशिखरेंसीं समान। शालवृक्ष उपटून। मारावया अकंपन। हनुमान जाण चालिला ॥५॥ बळें हाणितां शालवृक्ष। अकंपन अति दक्ष। हातींच्या हातीं छेदिला देख। साधोनि लक्ष संग्रामीं ॥६॥ बळें हाणितां अत्यद्भुत। वृक्ष छेदिला हातांत। तेणें हनुमान अति विस्मित। वीर विख्यात अकंपन ॥७॥ हनुमंताचा आघात। निवारूं शके इंद्रजित। अकंपन वीर विख्यात। केला घात शालवृक्षा ॥८॥ बळें हाणितां मारुती। वृक्ष छेदिला हातींच्या हातीं। अकंपनाची रणव्युत्पत्ती[9]। सुर वानिती स्वर्गस्थ ॥९॥

विध्वस्तं कर्म तद् दृष्ट्वा हनूमान्प्रेक्ष्य विस्मितः। स गृहीत्वा गिरेः श्रृंगं जवेनाभिससार तम् ॥३६॥
दूरादेव महाबाणैरर्धचंद्रैर्व्यदारियत्। तं पर्वताग्रभाकाशे रक्षोबाणविदारितम् ॥३७॥
विकीर्णं पतितं दृष्ट्वा हनूमान्क्रोधमूर्च्छितः। सोऽश्वकर्णं समासाद्य रोषदर्पान्वितो हरिः ॥३८॥

---

शब्दार्थ : १. आकाश, २. बाणवर्षाव, ३. कष्टी, ४. प्रौढी मिरवून, ५. भिऊ नका म्हणून सांगत, ६. वानर. ७. निकराचे युद्ध. ८. नेटाने, ९. रणकौशल्य.

तूर्णमुत्पाटयामास महागिरिमिवोचितम्। तं गृहित्वा महाकायं भ्रामयामास संयुगे ॥३९॥
प्रधावन्नुरूवेगेन बभंज तरसा द्रुमान् ॥४०॥

अकंपनाचा प्रतिकार व दर्पोक्ती : अकंपनें छेदिला शालद्रुम। कपीचें वृथा गेलें कर्म। तेणें हनुम्यासीं विस्मय परम। दृढ विक्रम अकंपनां ॥१०॥ घायें मारावया अकंपन। गिरिशिखर घेवोनि जाण। हनुमान धांवला आपण। शिखरें प्राण घ्यावया ॥११॥ शिखर हाणितां हनुमान वीर। लघुलाघवें[1] विंधोनि शर। शतधा छेदिलें शिखर। बळें दुर्धर अकंपन ॥१२॥ अकंपन छेदितां शिखर। राक्षस करिती जयजयकार। बळ वानिती ऋषीश्वर। स्वर्गी सुरवर वानिती ॥१३॥ अर्धचंद्रबाणाच्या झडाडां। शिखर छेदूनि पाडितां पुढां। हनुमान विस्मित जाला गाढा। निर्वाणनिधडा अकंपन ॥१४॥ देखोनि अकंपनाची ख्याती। बाणलाघवी[2] शीघ्रगती। राक्षसांमाजी अति पुरुषांर्थी[3]। त्यासी मारुती मारूं पाहे ॥१५॥ अकंपनाचा घ्यावया प्राण। वृक्ष उपटोनि अश्वकर्ण। हनुमान धांवोनि आपण। वृक्ष भवंडोनि हाणित ॥१६॥ अश्वकर्णाच्या आघातीं। लघुलाघवें हाणी मारुती। वृक्ष सोडिले नेणों किती। पडावया क्षिती[4] अकंपन ॥१७॥ बाणलाघवी अकंपन। चमत्कारें शर विंधोन। वृक्ष छेदितां अश्वकर्ण। छेदी आन आन[5] द्रमा[5] ॥१८॥ वृक्ष छेदोनि पाडितां तळीं। अकंपन दे आरोळी। आल्हाद राक्षसांच्या दळीं[6]। पिटिळी टाळी सकळिकीं ॥१९॥ सुरासुर नर वानर। अवघे आश्चर्य मानिती थोर। अकंपन निधडा वीर। स्वयें समग्र मानिती ॥२२०॥ हनुमंताचे तीन विक्रम। अकंपनें केलें निर्धर्म[7]। तेणें कपीसीं सुखसंभ्रम। आल्हाद पूर्ण युद्धाचा ॥२१॥ अकंपना तुझी युद्धख्याती। रणीं तुष्टलों मी मारुती। तुज मी न मारीं युद्धावर्ती। जाय लंकेप्रती विजयेंसीं ॥२२॥ ऐकोनि हनुमंताचें वचन। हास्य करी अकंपन। जंव तुझा घेतला नाहीं प्राण। तंववरी जय मज नाहीं ॥२३॥ आधीं मारीन हनुमंता। मग मारीन सौमित्रिरघुनाथां। अंगदसुग्रीव जांबवंतां। मारीन समस्तां वानरां ॥२४॥ इतुकें केलिया रणकंदन। माझ्या अंगीं विजय पूर्ण। ऐसें ऐकतांचि वचन। हनुमान दारुण क्षोभला ॥२५॥

हनूमान्परमकुद्धःश्चरणैः कंपयन्महीम् । जघान समरे क्रुद्धान्पदातींश्चापरान्बूहून् ॥४१॥
तमापतंतं संरब्धं राक्षसानां भयावहम्। ददर्शाकंपनो वीरश्चुक्रोध न ननाद च ॥४२॥
स चतुर्दशभिर्बाणैर्विशिखैर्मर्मभेदिभिः। निर्बिभेद महावीर्यं हनुमंतमकंपनः ॥४३॥
स तथा तेन विद्धोऽपि बहुभिर्मार्गणैः शितैः। हनूमान् ददृशे वीरो रुधिरेण समुक्षितः ॥४४॥
उत्पाट्य सहसा वृक्षं कृत्वा वेगमनुत्तमम् । शिरस्यभिजघानाशु राक्षसेंद्रकंपनम् ॥४५॥

अकंपनाचा वध : हनुमान रागें धांवतां पाहीं। राक्षससैन्य रगडी पायीं। पुच्छघायें वीर पाडित ठायीं। अकंपन पाहीं कोपला ॥२६॥ चौदा बाणीं त्वरित। हृदयीं विंधिला हनुमंत। तेही बाणीं कपि उन्मत्त। क्रोधान्वित चालिला ॥२७॥ वृक्ष उपटोनि सत्राण[8]। मस्तकीं टाकितां संपूर्ण। रथा सारथ्यासहित जाण। सांडिला प्राण अकंपनें ॥२८॥

राक्षसांचे पलायन व रावणास क्रोध व चिंता : अकंपने सांडितां प्राण। धाकें पळती रक्षोगण। त्यांसी वानरीं केलें कंदन[9]। रणमर्दन राक्षसां ॥२९॥ वोडण[10] खड्ग[11] धनुष्यबाण। सांडोनि अलंकार आभरण। राक्षस घेवोनि पळती प्राण। रणीं अकंपन पाडिला ॥३०॥ राक्षस अति भयें पळत। लंकाद्वारीं विमर्द[12] होत। वानर आले रे मारित। बोंब सांगत नगरस्थां ॥३१॥ पुढें पळत मागें पाहत। अवघे आलें लंकेआंत। रावणासी स्वयें सांगत। केला घात अकंपना ॥३२॥ घायाळ आलें कुंथत। ते सांगतीं निजवृत्तांत। एकला येवोनि हनुमंत। केला

शब्दार्थ : १. मोठ्या कुशलतेने, २. बाण मारण्यात कुशल, ३. पराक्रमी, ४. जमिनीवर, ५. दुसरे वृक्ष, ६. सैन्यात, ७. व्यर्थ, फुकट, ८. आवेशाने, ९. संहार, १०. ढाल, ११. तरवार, १२. संहार.

घात सर्वांचा ॥३३॥ हें ऐकोनि लंकानाथ। करावया राक्षसांचा घात। मूळीं लागला हनुमंत। चिंताग्रस्त रावण॥३४॥

समेत्य हरयः सर्वे हनूमंतमपूजयन्। सोऽपि प्रहृष्टस्तान्सर्वान्वानरान्प्रत्यपूजयत्॥४६॥

मर्दूनि राक्षससैन्य। करितां रामनामगर्जन। परतले वानरगण। उल्लास पूर्ण विजयाचा ॥३५॥ वानर मिळोनि समस्त। लोटांगण नमनयुक्त। अवघीं पूजिला हनुमंत। यशवंत रणरंगी॥३६॥ निगर्वी वीर हनुमंत। अंगद सुग्रीव जांबवंत। नळनीळादि महंत। वानर समस्त वंदिले॥३७॥ घालोनियां लोटांगण। वंदिले श्रीराम लक्ष्मण। जयजयकारें गर्जे गगन। हर्षे त्रिभुवन कोंदले॥३८॥ एकाजनार्दना शरण। स्वयें हनुमंत आपण। अकंपनातें निर्दळून। श्रीरामचरण वंदिले॥३९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडें एकाकारटीकायां वज्रदंष्ट्रअकंपनवधो नाम पंचदशोऽध्यायः॥१५॥ ओव्या॥२३९॥ श्लोक॥४६॥ एवं॥२८५॥

## अध्याय सोळावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### प्रहस्ताचा वध

पूर्वील प्रसंगीं हनुमंतें। रणीं मारिलें अकंपनातें। ऐकोनियां लंकानाथें। क्रोधान्वित[१] उद्वेगी[२]॥१॥

ततस्तु रावणः क्रुद्धः श्रुत्वा हतमकंपनम्। पुरीं परिययौ लंकां सर्वगुल्मानवेक्षितुम्॥१॥
रुद्धां तु नगरीं दृष्ट्वा रावणो राक्षसेश्वरः। उवाचात्महितं काले प्रहस्तं युद्धकोविदम्॥२॥
पुरस्योपनिरुद्धस्य सहसा पीडितस्य च। नान्यं समर्थं पश्यामि युद्धे युद्धविशारद॥३॥
अहं वा कुंभकर्णो वा त्वं वा सैन्यपतिर्मम। इंद्रजिद्वा निकुंभो वा वहेयुर्भारमीदृशम्॥४॥
सर्वं बलमिदं शीघ्रं मायया परिगृह्य च। विजयायाशु निर्याहि यत्र सर्वे वनौकसः॥५॥

**रावण लंकादुर्गाचा बंदोबस्त करतो :** एके हनुमंतें रणांगणीं। अकंपन पाडोनियां रणीं। मारिल्या राक्षसांच्या श्रेणी[३]। त्यापुढे कोणी उरेना॥२॥ अकंपनाचा भरवसा होता। मारील सौमित्रा रघुनाथा। अंगदादि हनुमंतां। मारील समस्तां वानरां॥३॥ तंव जाला विपरीतार्थ। अकंपना मारी हनुमंत। दुःखें तळपळे लंकानाथ। आला आकांत राक्षसां॥४॥ अकंपनाऐसा देखा। आणीक न मिळे युद्धसखा। परम धाक दशमुखा। सन्नद्ध[४] लंका तो करवी॥५॥ लंकादुर्गसंरक्षण। गुल्मोगुल्मीं[५] हिंडे रावण। दृढ कपाटें बंधन। करवी आपण साक्षेपें॥६॥ दुर्गपरिधी[६] सखोल आगड[७]। यंत्रमारें मारक दगड। रावणें दुर्ग केलें गूढ। अति अवघड पारखिया[८]॥७॥ आगड गुल्में यंत्रसंभार। दुर्घट दुर्ग कायसे थोर। शिखरें उडोनि आले वानर। निशाचर निर्दळिती॥८॥ वानरीं रोधिलें लंकाभुवन। धाकिन्नला दशानन। प्रहस्त पाचारोनि प्रधान। युद्धविधान आलोची[९]॥९॥

**रावण प्रहस्तला पाठवितो :** ध्वज पताका विध्वंसून। करित राक्षसां कंदन। वानरीं व्यापिलें लंकाभुवन। अति दारुण युद्धार्थी॥१०॥ रणीं पडिल्या अकंपन। वानरांसीं करावया रण। आम्ही मुख्यत्वें पांच जण। युद्धाविधानरणवेत्ते॥११॥ रावण आणि कुंभकर्ण। प्रहस्त सेनानी प्रधान। इंद्रजितासी आंगवण। पांचवा जाण निकुंभ॥१२॥ जैसाच मी राजा रावण। तैसाच तूं प्रहस्त प्रधान। दोहींची समान आंगवण। विचक्षण रणवेत्ते॥१३॥ पदाती सेनानी महावीर।

शब्दार्थ : १. अत्यंत कोपयुक्त, २. दुःखी होत्साता, ३. समुदाय, ४. तयार, ५. प्रत्येक सैन्यभागामधून ६. किल्ल्याचा परिघ, ७. खंदक. ८. परक्यास, ९, पाहू लागला.

पालाणूनी[1] अश्व कुंजर। संजोगोनि[2] रहंवर। युद्धा सत्वर निघावें ॥१४॥ राम लक्ष्मण पाडोनि रणीं। वानर उरों नेदीं कोणी। वेरी निर्दळूनी रणीं। मजलागोनी सुख द्यावें ॥१५॥ तुवां जावोनि संग्रामांत। इतुका करावा पुरुषार्थ। कंठमाळा दे लंकानाथ। साधीं विजयार्थ प्रहस्ता ॥१६॥ इंद्रजिताचें काळें वदन। वृथा गेलें शरबंधन। तैसें न करावें आपण। राम लक्ष्मण मारावे ॥१७॥ प्रहस्त म्हणे लंकापती। बिभीषणें केली विनंती॥ श्रीरामा अर्पिल्या सीता सती। सुखप्राप्ती सर्वांसी ॥१८॥

प्रहस्ताची दर्पोक्ती : त्याचें नायकतां वचन। युद्ध मांडिलें निर्वाण। सत्य बोलिला बिभीषण। तें हें रण ओढवलें ॥१९॥ समग्र माझे लळे पाळून। तुवां केलें प्रतिपाळण। तुझें कार्या वेंचितां प्राण। रणांगण पाहे माझें ॥२०॥

मद्बाणानां तु वेगेन हतानां तु रणजिरे। अद्य तृप्यंतु मांसादाः पक्षिणः काननौकसः ॥६॥
न हि मे जीवितं रक्ष्यं पुत्रदारधनानि च। संपश्य मां जुव्हयंतं त्वदर्थं जीवितं रणे ॥७॥
हुताशनं तर्पयित्वा ब्राह्मणाश्चं प्रणम्य च। स्रजश्च विविधाकारा जगृहुस्त्वाभिमंत्रिताः ॥८॥
रावणं प्रेक्ष्य राजानं प्रहस्तः पर्यवारयत्। अथामंत्र्य तु राजानं भेरीमाहत्य भैरवाम् ॥९॥
आरुरोह रथं दिव्यं प्रहस्तः सज्जकार्मुकः। ब्राह्मणाः स्वस्तिवचनाः संग्रामाय जयाशिषः ॥१०॥

संमुख ऐकतां रावण। प्रहस्त बोलें आंगवण। प्रथम विंधितांचि बाण। राम लक्ष्मण मारीन ॥२१॥ अंगद सुग्रीव हनुमंत। मारीन नळ नीळ जांबवंत। वानर मारीन समस्त। रणाआंत निसनिसूं[3] ॥२२॥ वाहवीन अशुद्धाचे[4] पूर। वृक[5] जंबुक श्येन घार। मांस भक्षिती वनचर। ऐसा रणमार करीन ॥२३॥ सांडोनि जीविताची आस। रणांगणीं घातली कांस। त्यजून स्त्रीपुत्रविलास। स्वामिकार्यास साधीन ॥२४॥

प्रहस्ताची स्वामिकार्यार्थ प्रयाणाची तयारी : समुहूर्तीं करितां प्रयाण। घृतप्लुतादि अवदान[6]। प्रथम पूजिला हुताशन[7]। पूजिले ब्राह्मण विधियुक्त ॥२५॥ मुख्य ब्राह्मणांचें पूजन।अन्न धन आणि सन्मान। प्रहस्त घाली लोटांगण। आशीर्वचन रणविजयी ॥२६॥ मुकुट कुंडलें रणकंकण। कवच शोभे रत्नभूषण। सज्जोनियां धनुष्यबाण। करी प्रयाण प्रहस्त ॥२७॥ बाहुंअंगदें पदक गळां। हिरे रत्न कंठीं मुक्तामाळा। अंगीं बाणोनि रणसोहळा। रावणाजवळी पूसत ॥२८॥ जो जो गेला संग्रामासीं। परतोनी न ये रायापासीं। हेचि भेटी तुम्हा आम्हांसी। लागे पायासीं प्रहस्त ॥२९॥

रावणाचा गहिवर व प्रहस्ताला निरोप : ऐकोनि प्रहस्तवचन। रावणासी आलें रुदन। घांवोनि दिधलें आलिंगन। दोघे जण गहिंवरती ॥३०॥ बोलती सभेचें सज्ञान। दोघोचेंही अशुभ चिन्ह। युद्धप्रयाणीं रुदन। अपशकुन मुख्यत्वें ॥३१॥ जैसाचि स्वयें रावण। तैसाचि प्रहस्त प्रधान। ध्वज पताका शोभायमान। सेना सज्जून आणिली ॥३२॥ ज्वाळमाळारत्नांकित। रथ अतिशयें शोभिवंत। वरी ध्वज लखलखीत। घोंस लोंबत मुक्तामाळां ॥३३॥ नमस्कारोनि रावण। प्रहस्तें करितां रथारोहण। सज्जोनियां धनुष्यबाण। भेरी निशाण[8] त्राहाटिलें[9] ॥३४॥

लंकायां निर्ययौ शीघ्रं बलेन महता वृतः। निनदंतः स्वरान्घोरान्राक्षसा जग्मुग्रतः ॥११॥
तस्य निर्याणघोषेण राक्षसानां च गर्जताम्। ववर्षू रुधिरं देवाः प्रहस्तस्य रथोपरि ॥१२॥
ध्वजमूर्धनि गृध्रश्च विलीनो दक्षिणामुखः। प्रयातस्य च संग्रामे हयश्च विकृतोऽभवत् ॥१३॥
अश्रुपूर्णमुखश्चास्य दक्षिणः स्खलितो हयः। सारथेर्बहुधा चास्य पृतनामेव गाहतः ॥१४॥

---

शब्दार्थ : १. सज्ज करून, २. जोडून, ३. तोडतोडून, ४. रक्ताचे, ५. लांडगे, ६. होमद्रव्य ७. अग्नी, ८. रणभेरी, ९. वाजविले.

प्रतोदो न्यपतद्धस्ताद्धरण्यां हयशासिनः। निर्याणश्रीश्च तस्यासीद्भास्वरा च सुदुर्लभा ॥१५॥
सा ननाश मुहूर्तेन समे च स्खलिता हयाः ॥१६॥

प्रहस्ताचे रणभूमीकडे प्रयाण : वाजंत्र्यांचा निजगजर। निघडे वीर निशाचर। उघडोनी लंकाद्वार। राक्षसभार चालिले ॥३५॥ प्रहस्तरथासमोर। राक्षस गर्जती घरघर। सिंहनाद करिती घोर। भार दुर्धर चालिले ॥३६॥

प्रहस्तास अपशकून : तेचि समयीं निरभ्रीं[1]। प्रहस्ताच्या रथावरी। रुधिरवृष्टि आरक्तधारीं। उल्का[2] चौफेरीं स्वयें पडतीं ॥३७॥ अश्रुमुख रथींचे घोडे। दक्षिणवारू अडखळोनि पडे। सारथियें उठवितां निवाडें। चाबूक पडे रथचक्रीं ॥३८॥ जेणें करावें अश्वशासन। तो प्रतोद[3] झाला भग्न। सारथ्याचें सचिंत मन। अपशकुन धुरेसीं ॥३९॥ वारू सज्जोनि वाडेंकोडें। रथ सज्जोनि चालतां पुढें। एक वेळे चारी घोडे। अडखळतां पडे सारथी ॥४०॥ एवं सैन्याच्या संभारीं। पडिले घोडे सांडोनि दुरी। रथ सज्जिला वारुवांतरीं। सारथि वरी बैसला ॥४१॥ त्याच काळीं ध्वजीं देख। गीध बैसे दक्षिणाभिमुख। भालू भुंकती अग्निमुख। परम दुःख प्रहस्ता ॥४२॥ प्रहस्त जंव पाहे पुढें। तंव अशिर छाया भूमी पडे। मरण आलें मज रोकडें। जीवीं धडफुडें कळो सरलें ॥४३॥ मागें सरतांचि आपण। अपमानें दंडील रावण। श्रीरामापुढें देतां प्राण। ब्रह्म परिपूर्ण मी होईन ॥४४॥ ऐसिया करोनि निश्चयासी। अवश्य जावें युद्धासीं। परम उल्लास प्रहस्तासीं। निजसैन्यासी अवलोकी ॥४५॥ दारुण देखोनि अपशकुन। सैन्य सेनानी उद्विग्न। अवघे जाले मनोरथभग्न। तंव कळलें चिन्ह प्रहस्ता ॥४६॥ आपली दावोनि आंगवण। सैन्यासी उल्लास द्यावा पूर्ण। ऐसें साधोनि विंदाण। केलें गर्जन प्रहस्तें ॥४७॥

कालो भवेयं कालस्य दहेयमपि पावकम् । मृत्युं मरणधर्मेण संयोजयितुमुत्सहे ॥१७॥
तस्य तद्वचनं श्रुत्वा प्रहस्तस्य रणाजिरे। सुसंरब्धाश्च ते नेदू राक्षसा युद्धकांक्षिणः ॥१८॥
ततः प्रहस्तं निर्यांतं भीमं भीमपराक्रमम् । गर्जंतं सुमहाकायं राक्षसैरभिसंवृतम् ॥१८॥
ददर्श महतीं सेनां वानराणां बलीयसाम्। अतिसंजातहर्षाणां प्रहस्तमभिगर्जताम् ॥२०॥

प्रहस्ताचे गर्वयुक्त आव्हान : म्यां साधिलें रणांगण। आजी काळातें निर्दळीन। अंतकाळातें आकळीन। अग्नीतें जाळीन प्रतापें ॥४८॥ राम लक्ष्मण मानवी दोन्ही। वानरांतें कोण गणीं। मृत्यु मारोनियां रणीं। वाधावणी[4] विजयाची ॥४९॥ ऐकोनि प्रहस्ताचें वचन। वीरीं केलें सिंहगर्जन। उल्लासलें त्याचें सैन्य। रणकंदन करावया ॥५०॥ प्रहस्त देखोनि ससैन्य। वानरांसी उल्लास पूर्ण। राक्षसांचें करावया कंदन। वीर गर्जोन चालिले ॥५१॥ राक्षसांचे गिरागजर। सिंहनाद करिती थोर। वानर करिती भुभुःकार। रामनामें वीर गर्जती ॥५२॥

तेषामन्योन्यमासाद्य संग्रामः समुहानभूत्। बहूनामश्मवृष्टिं च शरवृष्टिं च वर्षताम् ॥२१॥
बहवो राक्षसा युद्धे बहून्वानरयूथपान् । वानराश्चापि रक्षांसि विजघ्मुर्बहवो बहून् ॥२२॥
ते शूलैः प्रथिताः केचिद्वानराः परमायुधैः। परिघैराहताः केचित्केचिच्छिन्नाः परश्वधैः ॥२३॥
वानरैराक्षसाश्चैव पार्श्वतश्च विदारिताः। पादपैर्गिरिश्रृंगैश्च संपिष्टा धरणीतले ॥२४॥

वानर राक्षससैन्याचा संग्राम : वानर आणि निशाचर। युद्धा मिसळले दुर्धर। घाय हाणिती निष्ठुर। येरयेरां नोकोनी[5] ॥५३॥ धीर वीर राहें साहें। मागें न ठेविती पाये। माथां वाजती घाये। रुधिर वाहे भडभडां ॥५४॥ राक्षस खेंचिती शूळाग्रें। वानर टाकिती शिळाशिखरें। राक्षस हाणिती तोमरें। कपि वृक्षाग्रें ढिलाविती ॥५५॥ वीरीं विंधितां दृढ बाण। वानर

शब्दार्थ : १. ढग नसताना, २. अग्निरूप तारा, ३. चाबूक, ४. वाद्ये वाजवणे, ५. धिक्कारून.

वर्षती पाषाण। शक्तिहाणिती रक्षोगण[१]। पर्वतीं प्राण वानर घेती ॥५६॥ घायीं वानर पडतां धरणीं। रामनामाच्या स्मरणीं। व्यथा जावोनि तत्क्षणीं। भिडती रणीं रणमारें ॥५७॥ वानरवीरां प्रताप श्रेष्ठ। शिळाशिखरें कडकडाट। रणीं राक्षसां करोनि पीठ। पाडिलें स्पष्ट क्षितितळीं[२] ॥५८॥ कपि मर्दितां[३] निशाचर। रणीं उठिला हाहाकार। प्रहस्त प्रधान चौघे वीर। वानरां मार करूं आलें ॥५९॥

करंधमः कुंभहनुर्महानादः समुन्नतः। एते प्रहस्तसचिवाः सर्वे जघ्नुर्वनौकसः ॥२५॥
जांबवांस्तु सुसंरब्धः प्रगृह्य विपुलां शिलाम्। पातयामास तेजस्वी महानादस्य वक्षसि ॥२६॥
द्विविदो गिरिशृंगेण जघानैकं करंधमम्। दुर्मुखः पुनरुत्थाय कपिः सविपुलं द्रुमम् ॥२७॥
राक्षसं क्षिप्रहस्तं तु समुन्नतमपोथयत्। अथ कुंभहनुस्तत्र तारेणासाद्य वीर्यवान् ॥२८॥
वृक्षेण महता प्राणान्कपिस्तस्य समाददे। अमृष्यमाणस्तत्कर्म प्रहस्तो रथमास्थितः ॥२९॥
चकार कदनं घोरं धनुष्पाणिर्वनौकसाम् ॥३०॥

प्रहस्ताच्या चार अमात्यांचे आगमन : प्रहस्त प्रधान चौघे वीर। रणप्रवीण महाझुंझार। मारावया वानरभार। अति दुर्धर चालिले ॥६०॥ करंधम आणि महानाद। कुंभहनु आणि समुन्नद्ध। चौघे वीर रणउन्नद्ध। करावया युद्ध लोटले ॥६१॥ वर्षोनिया बाणजाळा। वृक्ष पर्वत छेदोनि शिळा। रणीं मर्दिती वानरदळा। वक्षःस्थळा विंधोनी ॥६२॥ चौघे जण चहूंकडोनी। वानर शरजाळें वेढोनी। मारूं आदरिलें रणीं। दुर्धर बाणीं भेदोनी ॥६३॥ वानर उडतां आकाशीं। बाण भेदोनि सपिच्छी। सवेंचि पाडिती भूमीसीं। कासाविसी कपिसेना ॥६४॥ वानरीं करितां उड्डाण। उरीं शिरीं विंधिती बाण। हाणितां पर्वत पाषाण। कर छेदून पाडिती ॥६५॥ ऐसे प्रधान चौघे जाण। करितां वानरां कंदन। कपि धाविन्नले चौघे जण। प्रधानप्राण घ्यावया ॥६६॥ द्विविद दुर्मुख क्रोधान्वित। तार आणि जांबवंत। करावया प्रधानांचा घात। युद्धाआंत मिसळले ॥६७॥ द्विविद येवोनि गर्जोन। करंधमातें पाचारोन। पुच्छें छेदोनि धनुष्यबाण। गिरिशृंगें[४] पूर्ण ठोकिला ॥६८॥ गिरिशिखरें हाणितां पूर्ण। रणीं अशुद्ध[५] वमून। करंधमें सांडिला प्राण। अर्ध क्षण न लगतां ॥६९॥ दुर्मुखासी आला क्रोध। पाचारोनि समुन्नद्ध। दोघीं केलें मल्लयुद्ध। विविध बंध रणमारें ॥७०॥ आणोनि प्रहस्तासंमुख। उपटोनियां तमाल रुख[६]। समुन्नद्धा हाणितां देख। न घेतां उदक निमाला ॥७१॥ रणीं खवळला जांबवंत। महानादाते पाचारित। शीघ्र करोनि शिळाघात। युद्धाआंत पाडिला ॥७२॥ कुंभहनु निशाचर। त्यासी तगटला[७] तार वीर। करितां चपेटघातमार। पायीं वानर धरियेला ॥७३॥ रागें उपटितां त्यासी। पुच्छें निमटिलें घाठीसी[८]। कुंभहनु पाहे कासाविसी। बळ कपीसीं चालेना ॥७४॥ कुंभहनु मूर्च्छापन्न। तार गेला पैं निसटून। सवेंचि शालवृक्ष हाणोन। घेतला प्राण कुंभहनूचा ॥७५॥ चारी प्रधान योद्धे पूर्ण। रणमारे विचक्षण। त्यांचा वानरीं घेतला प्राण। शंखस्फुरण राक्षसां ॥७६॥ चहूं प्रधानां झाला घात। बोंब उठली राक्षसांत। येरयेरांपुढें पळत। अति आकांत राक्षसां ॥७७॥ चौघे मारून प्रधान। राक्षसांचे केले कंदन। प्रहस्त चालिला आपण। दुर्धर बाण सज्जूनी ॥७८॥ निर्दळावया वानरभारा[९]। दांत खातसे करकरां। ज्वाळा निघती नेत्रद्वारा। रहंवरा पेळिलें[१०] ॥७९॥ करितां वानरसेना पीठ। रथ लोटिला घडघडाट। बाण विंधोनि तिखट। वीर विकट खोंचिलें ॥८०॥ वानरांचे निजघात। पर्वत शिळाद्रुमआघात। बाणाग्रें छेदोनि समस्त। रणीं खोचित

शब्दार्थ : १. राक्षसमंडळी, २. पृथ्वीवर, ३. नाश करिता, ४. पर्वतशिखरे टाकून, ५. रक्त, ६. वृक्ष, ७. भिडला ८. गळ्याला, ९. वानरसमुदायाला. १०. पुढे हाकिले.

वानरां ॥८१॥ मधुमाधव[1] मासांआंत। पळस फुलती आरक्त। तैसे वानर रुधिरोक्षित[2]। प्रवाहे रक्त रणरंगीं॥८२॥ प्रहस्त धनुर्वाडा दुर्धर। रणयोद्धा अति चतुर। बाणीं विंधित वानर। प्रवाहे पूर अशुद्धाचा[3]॥८३॥

सा मही रुधिरौघेण प्रच्छन्ना संप्रकाशते । संच्छन्ना माधवे मासि पलाशैरिव पुष्पितैः ॥३१॥
शोणितौघां महातोयां नदीं सागरवहिनीम्। गृध्रहंसवराकीर्णां कंकसारसनादिताम् ॥३२॥
मेदःफेनसमाकीर्णामावर्तस्वननिःस्वनाम् ॥३३॥

वानर आणि निशाचर। रणीं भिडले घोरांदर। वाहती अशुद्धाचे पूर। नदी दुस्तर उलथली॥८४॥ प्रहस्तें करितां रणख्याती। अशुद्धें पूर्ण जाली क्षिती। चारी बोटें न दिसे रिती। पूर वाहती रुधिराचे॥८५॥ गीध कंक बक घार। वृक जंबूक रानसूकर। मांस भक्षिती अपार। प्राशिती रुधिर यथेष्ट॥८६॥ रणनदी सम सागर। प्रवाहें प्राप्त यमद्वार। रणीं असतां श्रीरामचंद्र। प्रवाहें पूर परब्रह्मीं॥८७॥ धन्य राक्षसांची ख्याती। रणीं पडतां ब्रह्मप्राप्ती। बाप कृपाळु रघुपती। सायुज्यमुक्ती शत्रूसीं॥८८॥ ऐसा रणनदीविनोद। रणप्रवाहें सुखस्वाद। हंस सारस करिती शब्द। अति अगाध अक्षोभ्य॥८९॥ ऐसी दुस्तर रणनदी। भेडा[4] नुतखे त्रिशुद्धी[5]। प्रहस्त मर्दितां वानरमांदी। नीळ सक्रोध क्षोभला॥९०॥

ततः सृजंतं बाणौघान्प्रहस्तं स्यंदने स्थितम् । ददर्श तरसा नीलो निघ्नन्तं वै प्लवंगमान् ॥३४॥
स तं परमदुर्धर्षमायांतं तं महाकपिः। प्रहस्तं ताडयामास वृक्षमुत्पाट्य वीर्यवान् ॥३५॥
स तेनाभिहतः क्रुद्धो नर्दन्राक्षसपुंगवः। ववर्ष शरवर्षाणि प्लवंगानां चमूपतौ ॥३६॥
रोषितः शरवर्षेण शालेन महता महान्। निजघान हयान्नीलः प्रहस्तस्य महाजवान् ॥३७॥

रथारुढ प्रहस्त कुशल। व्युत्पत्ती वर्षतां बाणजाळ। तेणें त्रासितां वानरदळ। नीळ तत्काळ क्षोभला॥९१॥ वृक्ष उपडोनि सबळ। प्रहस्तासी हाणितां नीळ। तेणें वर्षोनि बाणजाळ। वृक्ष समूळ छेदिला॥९२॥ वृक्ष छोदोनियां जाण। नीळावरी अति तीक्ष्ण। प्रहस्त वर्षला बाण। हस्तविंदान[6]लाघवी॥९३॥ येतां प्रहस्तबाण कडाडीं। पडत डोळियां झांपडी। वानरें कायसी बापुडीं। नीळा समपाडीं विंधिलें॥९४॥ प्रहस्ताच्या बाणश्रेणी। नीळ निवारी पुच्छपाषाणीं। रागें शालवृक्ष उपटोनी। घावो निवाणीं[7] ओपिला॥९५॥ प्रहस्त गेला हातोहातीं। अश्व ध्वज रथ सारथी। घायें नेले पैं भस्मांतीं। विस्तीर्ण क्षितीं पाडिले॥९६॥ येतां शालवृक्षआघात। धाकें गजबजिला प्रहस्त। रथ सांडोनि सवेग पळत। नीळ कृतांत क्षोभला॥९७॥ नीळ सेनापति महाबळी। सरथ अश्व सारथ्या करोनि होळी। पुढें चालिला रणसमेळीं। रणकल्लोळीं गर्जत॥९८॥

विधनुः स कृतस्तेन प्रहस्तो वाहिनीपतिः। प्रगृह्य मुसलं घोरं स्यंदनादवपुप्लुवे ॥३८॥
ततस्तौ वाहिनीमुख्यौ जातक्रोधौ तरस्विनौ। सिंहशार्दूलसदृशौ सिंहशार्दूलविक्रमौ ॥३९॥
आजघान तदा नीलं ललाटे मुसलेन सः। प्रहस्तः परमायत्तस्ततः सुस्राव शोणितम् ॥४०॥
ततः शोणितसंसिक्तः संगृहीत्वा महातरुम्। प्रहस्तस्योरसि क्रुद्धो विससर्ज महाकपिः ॥४१॥

शब्दार्थ : १. चैत्रवैशाखात, २. रक्ताने माखलेले, ३. रक्ताचा, ४. भित्र्याला, ५. खरोखर, ६. हस्तकौशल्यात प्रवीण, ७. निकराचे प्रसंगी.

तमचिंत्य प्रहारं स प्रगृह्य मुसलं महत्। अभिदुद्राव बलिनं बलान्नीलं प्लवंगमम्॥४२॥

देखोनि शालवृक्षआघात। मुसळ घेवोनि हातांत। रथावरूनि उडे प्रहस्त। सांडून तेथ चापशर॥९९॥ नीळ कपिसेनाधिपति। प्रहस्त रावणसेनापती। सेनापतीसी सेनापती। दोघें भिडती रणरंगीं॥१००॥ जैसे शरत्काळींचें पोळ[1]। दोघे जैसे सिंहशार्दूळ[2]। दोघांअंगीं प्रबळ बळ। दोघे चपळ रणमारा॥१॥ एक विंधी दृढ बाणीं। दुजा पिष्ट करी पाषाणीं। एक हाणी गदा विंदानीं[3]। दुजा द्रुमपाणी[4] रणमारें॥२॥ रथ भंगिला सहसारथी। प्रहस्त जाला पदाती। मुसळ घेवोनियां हातीं। लघु व्युत्पत्ती तळपत॥३॥ मुसळयुद्धीं अति कुशळ। लघुलाघवें हाणोनि मुसळ। भेदिलें नीळाचे कपाळ। केला बंबाळ अशुद्धें॥४॥ अशुद्धें[5] डंवरला[6] वानर। शोभे जैसा नृसिंहवीर। करावया प्रहस्तासीं मार। उडे सत्वर आकाशीं॥५॥ उडी घाल्लोनियां गजरीं। निघातें[7] हाणी उरावरी। प्रहस्त चालिला चांचरीं। स्वयें सावरी मूर्च्छेतें॥६॥ वीर प्रबळ प्रहस्त। कपीचा न मानूनि घात। मुसळ घेवोनि धांवत। करावया घात नीळाचा॥७॥

तस्य युद्धाभिकामस्य मृधे मुखलयोधिनः। प्रहस्तस्य शिलां नीलो मूर्ध्नि तूर्णमपातयत्॥४३॥
नीलेन कपिमुख्येन विमुक्ता महती शिला। बिभेद बहुधा घोरा प्रहस्तस्य शिरो महत्॥४४॥
स गतासुर्गतश्रीको गतसत्त्वो गतेंद्रियः। पपात सहसा भूमौ छिन्नमूल इव द्रुमः॥४५॥

लघुलाघवी मुसळहस्त। येतां देखोनि प्रहस्त। नीळ आनंदें नाचत। करावया घात पडिपाडें॥८॥ प्रहस्त झेलितां मुसळ। सवेग मारूं आला नीळ। नीळें घेवोनि शीघ्र शिळ। त्याचे कपाळीं ओपिली॥९॥ सबळ बळें हाणितां शिळा। शतधा[8] भेदिलें कपाळा। अशुद्ध वाहत भळभळां। क्षितितळा उलंडला॥११०॥ आयुष्य गेले हातोहातीं। प्राण सांडिला इंद्रियवृत्ती। देहींची पैं गेली मतीं। पाडिला क्षितीं भणभणित॥११॥ गेले यश गेली कीर्तीं। गेली त्याची शौर्यशक्ती। गेली गेली सन्मानमहती। पाडिला क्षितीं भणभणित॥१२॥ पुष्पित सपल्लव सफळ। वृक्ष उलंडे छेदितां मूळ। तेंवीं प्रहस्त वीर प्रबळ। पडे तत्काळ क्षितितळीं॥१३॥

हस्ते प्रहस्ते नीलेन तदकंप्यं महाबलम्। न शेकुः समवस्थातुं निहते वाहिनीपतौ॥४६॥
सेतुबंधं समासाद्य विशीर्णं सलिलं यथा। रक्षःपतिगृहं गत्वा ध्यानमूकत्वमागता॥४७॥
ततस्तु नीलो विजयी महाबलः प्रशस्यमानः स्वकृतेन कर्मणा।
समेत्य रामेण सलक्ष्मणेन प्रहृष्टरूपोऽथ बभूव यूथपः॥४७॥

नीळें मारिला प्रहस्त। बोंब उठली राक्षसांत। मुख्य धुरेचा जाला घात। अति आकांत लंकेसीं॥१४॥ संमुख रहावया जाण। कोणी न धरती आंगवण। पळतां राक्षस कंपायमान। लंकाभुवन ठाकेना॥१५॥ पळतां पायीं वेंगडी[9] वळत। धाकें धाकें मागें पाहत। रणीं पडल्या प्रहस्त। अति आकांत राक्षसां॥१६॥ देखोनि प्रहस्ताचें मरण। एकां पडिलें महामौन। भये मूर्च्छित जालें मन। कार्यकारण विसरले॥१७॥ कुंभ[10] भंगलिया जाण। सैरा पसरे जीवन[11]। प्रहस्त निमाल्या[12] प्रधान। पळे सैन्य सैरावैरां॥१८॥ नीळ सुग्रीव सेनापती। प्रहस्त मारोनि रणव्युत्पत्ती। स्वयें पावला विजयवृत्ती। वानर स्तविती स्वानंदें॥१९॥ नीळाची

---

शब्दार्थ : १. माजलेले बैल, २. सिंह आणि वाघ, ३. कौशल्याने, ४. हातात वृक्ष असलेला, ५. रक्ताने, ६. भरला, शोभला, ७. आघात करून, ८. शेकडो ठिकाणी, ९. पेटके आले, गोळे आले, १०. माठ, ११. पाणी, १२. मरण पावता.

विजयख्याती। स्वयें जुत्पत्ती वानिती। स्वमुखें वानी रघुपती। वानी कीर्ती सौमित्र ॥१२०॥ नीळ येवोनि आपण। श्रीरामा घाली लोटांगण। रामें दिधलें आलिंगन। समाधान स्वानंदें ॥२१॥ लक्ष्मणाचें वंदी चरण। तेणेंही दिधलें आलिंगन। नीळाचें भाग्य गहन। करिती स्तवन सुरवर्य ॥२२॥ अंगद सुग्रीव जांबवंत। साक्षपें[1] वंदिला हनुमंत। नळकुमुदादि जुत्पती समस्त। नीळ वंदित स्वानंदें ॥२३॥ सुग्रीवे थापटिली पाठी। अंगद स्वानंदें लावी कंठीं। वानर सांगती विजयगोष्टी। नीळ जगजेठी रणयोद्धा ॥२४॥ श्रीराम असतां पाठिराखा। रणीं वानरां नाहीं शंका। जिणावया[2] दशमुखा। करिती आवांका[3] अवघेही ॥२५॥ एका जनार्दना शरण। श्रीरामदृष्टीपुढें रण। रण नव्हे तें ब्रह्म पूर्ण। घाय ते जाण महाबोध ॥२६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां प्रहस्तवधो नाम षोडषोऽध्यायः ॥१६॥ ओंव्या ॥१२६॥ श्लोक ॥४८॥ एवं ॥१७४॥

## अध्याय सतरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### सुग्रीव मूर्च्छित पडतो

प्रहस्त वधाची वार्ता ऐकून रावण स्वतः जाण्याचे ठरवितो : पूर्व प्रसंगीं रणाआंत। नीळें मारिला प्रहस्त। ऐकोनियां लंकानाथ। अति आकांत पावला ॥१॥ रावणाचा अति आप्त। प्रधान सेनानी प्रहस्त। त्याचा नीळें केला घात। लंकेआंत आकांत ॥२॥

प्रहस्तस्य वधं श्रुत्वा रावणो भ्रांतमानसः। राक्षसानादिदेशाथ राक्षसेंद्रो महाबलः ॥१॥
कार्या शत्रुषु नावज्ञा यैरिंद्रबलसूदनः। सूदितः सैन्यपालो मे सानुयात्रः सकुंजरः ॥२॥
सोऽहं रिपुविनाशाय विजयाया विचारयत्। स्वयमेव गमिष्यामि रणशीर्ष तदद्‌भुतम् ॥३॥
अथ तद्वानरानीकं रामं च सहलक्ष्मणम्। निर्दहिष्यामि बाणौघैः शुष्कं वनमिवानलः ॥४॥

नीळें मारिला प्रहस्त। बोंब उठली लंकेआंत। तें ऐकोनि लंकानाथ। जाला भ्रांत सक्रोधी ॥३॥ इंद्रबळेंसीं समसमान। तो प्रहस्त मारिला प्रधान। शत्रु वाढलें संपूर्ण। त्याचें मर्दन मी करीन ॥४॥ लक्ष्मणासहित श्रीरघुनाथ। मी मारीन म्हणे लंकानाथ। करावया वानरांचा अंत। रावण निघत संग्रामा ॥५॥ युद्धा जातां लंकानाथ। धेंडें[4] पडिलीं नगरांत। वीरीं निघावें त्वरित। अश्वगजरथभारेंसीं ॥६॥ स्वयें वानरीं आपण। विरुपाक्ष अकंपन। मारिला प्रहस्त प्रधान। शत्रु सामान्य म्हणों नये ॥७॥ शत्रु म्हणों नये सामान्य। त्याचें करूं नये हेळण[5]। यालागीं स्वयें रावण। निघे आपण संग्रामा ॥८॥ शुष्क तृण जाळी अनळ[6]। तैसें मारीन वानरदळ। राम लक्ष्मण वीर प्रबळ। मारीन तत्काळ रणमारें ॥९॥ एक धनुष्य श्रीरामशक्ती। दहा धनुष्यें माझें हातीं। त्यासीं पाडून बाणावर्ती[7]। पाडीन क्षितीं बंधु दोनी ॥१०॥

एवमुक्त्वा महातेजा रावणो राक्षसेश्वरः। अगच्छत्सहसा क्रूरो महासैन्येन संवृतः ॥५॥
स एवमुक्त्वा तु विमानरूपं रथं तुरंगैर्बहुभिः सुयुक्तम्।
प्रकाशमानं वपुषा ज्वलंतं समारुरोहामरराजशत्रुः ॥६॥
सशंखभेरीपणवप्रणादैराक्ष्वेडितास्फोटितसिंहनादैः।
पुण्यै स्तवैश्चापि सुपूज्यमानस्तदाययौ राक्षसराजमुख्यः ॥७॥

शब्दार्थ : १. आदरपूर्वक, २. जिंकण्यासाठी, ३. धैर्य, ४. प्रमुख वीर, ५. उपेक्षा, ६. अग्नी, ७. बाणांच्या भोवऱ्यात.

सशैलजीमूतनिकाशरूपैर्महाबलैः पावकदीप्त नेत्रैः।
बभौ वृतो राक्षसराजमुख्यो भूतैर्वृतो रुद्र इवामरेशः॥८॥
ततो नगर्याः सहसा महौजा निष्क्रम्य तद्वानरसैन्यमुग्रम्।
महार्णवाभ्रस्तनितं ददर्श समुद्यतं पादपशैलहस्तम्॥९॥

रावणाचा राक्षससैन्यसंभार : मारावया रामसौमित्र। निर्दाळावया वानरभार। युद्धा निघाला दशशिर। सैन्यसंभार सज्जूनी॥११॥ अतिरथी महारथी। अश्वती गजपती। युद्धा आले नरपती। सैन्यसंपत्ती सज्जूनी॥१२॥ कंगल टोप राघावळी। पाखरा[1] लखलखित तेजाळी। झळकती अश्वाची मोहळी[2]। दाटली फळी असिवारांची[3]॥१३॥ हो हो मा मा जी जी करीं। नाचविती तीं पायांवरी। एक वारू उडविती अंबरीं। एक धरेवरी थरकती॥१४॥ चढोनियां असिवारीं। सिंहनादें गर्जती गजरीं। यावा दावियला स्वारीं। शस्त्रसंभारीं लखलखित॥१५॥ वारू जुंपोनियां श्रेष्ठ। रथीं बैसलें सुभट। ध्वजपताका लखलखाट। घडघडाट रथांचा॥१६॥ आढाऊ चव्हाण अलंगाइत। सेली[4] सांबळी बाणाइत[4]। शूळ कट्यार फरशहस्त। अपरिमित पायांचें॥१७॥ तुळवे तळपती थैकारीं। जेठी पिलगती हुंकारीं। भिंडिमाळा घेवोनि करीं। केला वीरीं गडगर्ज॥१८॥ एका हतियेर मुसळ। एका खट्वांग प्रबळ। एका यष्टिका[5] सबळ। मिनलें दळ पायांचें॥१९॥ असंख्य दोहीं वाहीं कुंजर[6]। मदोन्मत्त सालंकार। वरी वळंघले वीर। परम शूर गजयोद्धे॥२०॥ जैसें चालतें विमान। तैसा रथ शोभायमान। ध्वजीं शोभे रथचिन्ह। पताका संपूर्ण झळकती॥२१॥ ज्वाळामाळाखचित रत्न। मणिमुक्ता-माळापरिलंबन। रथीं बैसला दशानन। शोभायमान अति शोभा॥२२॥ रथीं बैसला रावण। वीर करूं येती वंदन। सेवक सांगती गर्जोन। पहावें नमन धुरेचें॥२३॥ पर्वतप्राय निशाचर। मेघसदृश[7] महावीर। एकाचे धगधगीत नेत्र। वैश्वानरसमप्रभ[8]॥२४॥ कराळ विकराळ दांताळी। ऐशा वीरांच्या समेळीं। रावण निघे आतुर्बळी। रणकल्लोळीं भिडावया॥२५॥ घेवोनि गण साठी सहस्र। जेंवी कां निघे महारुद्र। तेंवी निघाला दशशिर। सैन्यसंभारसमवेत॥२६॥ छत्रशशांक त्याचे शिरीं। सूक्ष्म शलाका मणिमंजरी। मुक्ताफळांच्या झालरी। शोभती हारी पाचूंच्या॥२७॥ घावो घातला निशाणीं। शंखभेरीमृदंगध्वनी। ढोल टमकी किंकिणीं। रणविराणीं गाजती॥२८॥ गिडबिडी थापडी गजरीं। शृंग वेणु गर्जती गंहिवरीं। खाखाइलीं[9] रणमोहरीं[10]। भाट कैवारीं गर्जती॥२९॥ काहळा वाजती चिनकाहळा[11]। बुरुंगांच्या ध्वनि आगळा[12]। रणीं त्राहाटिला भोंगळा[13]। राक्षसदळा आल्हाद॥३०॥ ऐसें सैन्य सहपरिवारीं। वाजंत्र्यांच्या निजगजरीं। रावण निघाला बाहेरी। नरवानरीं युद्धार्थ॥३१॥ सैन्यपताका असंख्यात। श्वेत आरक्त सुनीळ पीत। दाडिंबसुमनीं[14] शोभत। सिंदूरान्वित अनेका॥३२॥ देखोनि राक्षससंभार। वानरीं आल्हाद अपार। घेवोनि वृक्ष शिळा शिखर। युद्धा सत्वर निघाले॥३३॥ जैसा अक्षोभ्य सागर। तैसा वानरांचा भार[15]। तें देखोनियां दशशिर। निशाचर सकंप॥३४॥

तद्राक्षसानीकमतिप्रचंड मालोक्य रामो भुजगेंद्रबाहुः।
बिभीषणं शस्त्रभृतां वरिष्ठमुवाच सेनानुगतः पृथुश्रीः॥१०॥

---

शब्दार्थ : १. झुली, २. मोहरकी (घोड्याच्या मुखांतील दोरी), ३. स्वारांची, ४. हे सैनिकांचे प्रकार आहेत. ५. काठी, ६. हत्ती, ७. मेघासारखे, ८. अग्नीप्रमाणे शोभणारे, ९. गर्जलीं, १०.११. रणवाद्यें, १२. गंभीर, १३. मुखवाद्य, तुतारी, १४. दाळिंबाच्या फुलांनी, १५. समुदाय

नानापताकाध्वजछत्रजुष्टं प्रासासिशूलायुधशस्त्रजुष्ठम्।
करस्येदमक्षोभ्यमभीरुजुष्टं सैन्यं महेंद्रोपमनागजुष्टम्॥११॥
ततस्तु रामस्य वचो निशम्य बिभीषणः शुक्रसमानबुद्धिः॥
शशंस रामस्य बलप्रवेकं महात्मनां राक्षसपुंगवानाम्॥१२॥

राक्षससैन्य पाहून श्रीराम बिभीषणाकडे चौकशी करतात : सुवेळाग्रीं[1] श्रीरामचंद्र। देखोनि राक्षससेनाभार। सैन्य अतिशयें अपार। वीर दुर्धर रणयोद्धे॥३५॥ बिभीषणा पुसे श्रीरामचंद्र। नानापताका ध्वज विचित्र। कोणाचा हा सैन्यसमुद्र। अति दुस्तर अक्षोभ्य॥३६॥ रावण सदा भयभीत। निःशंक कैसेनि पैं येत। अति गर्जत उल्लासें॥३७॥ शूळ शक्ति खड्गधार। गदा मुद्गल लहुडी चक्र। घेवोनियां शस्त्रसंभार। वीर दुर्धर भद्रजाती[2]॥३८॥ ऐसें बोलतां बोलतां। येतां देखोनि लंकानाथा। रणश्री चढली रघुनाथा। करावया घाता निजशत्रूच्या॥३९॥ आजानुबाहु भुजगेंद्रसमता[3]। स्फुरण आलें श्रीरघुनाथा। धनुष्य सज्जोनियां हाता। होय पुसतां बिभीषणा॥४०॥ सैन्यामाजी रणप्रवीण। निधडे निःशंक कोण कोण। त्यांचें सांग पां सुचिन्ह। रणीं शोधून मारावया॥४१॥

बिभीषणाचे श्रीरामांना कथन : ऐकोनि श्रीरामवचन। बिभीषण शुक्रबुद्धिसमान। राक्षससैन्यीं वीर दारुण। त्यांचें सुचिन्ह सांगत॥४२॥ सावध ऐकें श्रीरामचंद्रा। मुख्य करोनि दशशिरा। रणप्रवीण वारा धुरा[4]। अति दुर्धरा तें ऐक॥४३॥ बालार्कतेजेसीं[5] समान। गजस्कंधीं आरोहण। गज डुल्लतां डुले आपण। अकंपन तो जाण॥४४॥ मागें मारिला अकंपन। त्याच्या बळासीं समान। अतिशयेंसीं रणप्रवीण। निधडा पूर्ण रणयोद्धा॥४५॥ ज्याच्या ध्वजीं सिंहकेत। बळें गजबळें उन्मत्त। इंद्र धरोनि आणिला तित[6]। इंद्रजित तो जाला॥४६॥ धनुष्यीं करोनि टणत्कार। रथीं रणयोद्धा विचित्र। अतिकाय महावीर। अति दुर्धर सुरवर्यां॥४७॥ घंटा सनाद सालंकार। खरारूढ महोदर। गर्जताहे खरस्वर। आरक्तनेत्र रणयोद्धा॥४८॥ सुवर्णपाखरांचा[7] विचित्र वारू[8]। त्यावरी बैसला रावणकुमरू। नरांतक महावीरू। खड्गे दुर्धरू रणमारा॥४९॥ किंकिणीज्वाळमाळाविभूषित। गजारूढ शूळहस्त। त्रिशिरा गजयोद्धा विख्यात। विबुधांतक[9] रणमर्दी॥५०॥ ज्याच्या रथीं पन्नगकेत। रथानुगतीं अति विख्यात। धनुर्बाणीं रणाभिवृत्त। कुंभ उन्मत्त रिपुघाती॥५१॥ सुवर्णखचित रत्नकंठ। अष्टौ घंटा परिघ उद्भट। रणाभिमर्दनीं कुंभ श्रेष्ठ। शत्रुसंकट रणविजयी॥५२॥ ध्वजपताका शोभित। धनुर्धारी अतिपुरुषार्थ। देवांतक रावणसुत। रणोन्मत्त रणमारा॥५३॥ आरूढोनि शुभ्र गज। किरीटकुंडलीं कवचीं सज्ज। धनुर्धारी विकटझुंज। खरात्मज मकराक्ष॥५४॥ व्याघ्रमुख उष्ट्रमुख। तरसतगरसिंहमृग। ऐसें सैन्य ज्याचें विटंक। सैराट देख विकृतास्य[10]॥५५॥ पैल राजा दशशिर। शशिप्रभ श्वेतच्छत्र। कनकदंडी युग्मचामर। धुरा थोर थोर दोहीं बाहीं॥५६॥ ऐसा देखोनि सैन्यसमुद्र। स्वयें बोले श्रीरामचंद्र। रावण उग्र अत्युग्र। सुरासुर कांपती॥५७॥ रावण आला दृष्टीतळीं। त्यासीं विंधोनिं बाणजाळीं। त्याची करीन मी रांगोळी। गर्वामुमेळीं कुंथत॥५८॥ रावणाचें उग्र स्वरूप। रावणाचा उग्र प्रताप। तोडावया रावणदर्प। दृढ साटोप श्रीरामा॥५९॥

एवमुक्त्वा ततो रामो धनुरादाय वीर्यवान्। लक्ष्मणानुचरस्तस्थौ समुद्धृत्य शरोत्तमम्॥१३॥

---

शब्दार्थ : १. सुवेल पर्वताच्या शिखरावर, २. श्रेष्ठ, ३. सर्पराज वासुकीसमान, ४. मुख्य वीर, ५. उगवत्या सूर्याचे तेजासमान ६. तेव्हापासून, ७. सोन्याच्या झुलीनी युक्त असा, ८. घोडा, ९. देवांचा नाश करणारा, १०. तोंडे उघडी असे.

रावणाकडून बाणांचा वर्षाव : ऐसें बोलोनि आपण। रणीं लक्षोनि रावण। श्रीराम आणि लक्ष्मण। धनुष्यीं बाण सज्जिलें॥६०॥ येरीकडे दशशिर। देखोनि वानरसैन्य समुद्र। जैसा मथिजे क्षीरसागर। तेंवी वानरवीर विमर्दी॥६१॥ जेंवी मकरें सागरीं खळाळ। तेंवी वानरांचें दळ। रावणें केला हलकल्लोळ। रणजाळ वर्षोनी॥६२॥ रावणाचे उग्र शर। तेणें भेदले वानर। घायें तळमळित वीर। कपिसंभार खळबळिला॥६३॥

सुग्रीवाचे उड्डाण व रावणावर शिळाप्रहार: येतां देखोनि रावण। सुग्रीवासीं आलें स्फुरण। त्यासीं करावया रण। केलें उड्डाण अति वेगें॥६४॥ रे रावणा म्हणे राहें साहें। माझा यावा आला पाहें। तुज राखेल कोण मांये। एकें घायें मारीन॥६५॥ चोरोनि श्रीरामाची अंतुरी[1]। जावोनि लपसी लंकापुरीं। आजी आलासी बाहेरी। मारीन महामारीं रणमारें॥६६॥ ज्यावरी शिखरें असंख्यात। प्रचंड उपटोनी पर्वत। रणीं ठोकिला लंकानाथ। क्रोधान्वित सुग्रीवें॥६७॥ बाणीं विंधिलें अमित॥ परी तो भंगेना पर्वत। गजबजिला लंकानाथ। रणीं प्राणांत ओढवला॥६८॥ येतां देखोनि गिरिवर। राक्षसदळी हाहाकार। पर्वत आला अनिवार। दशशिर वांचेना॥६९॥

रावण ब्रह्मवरददत्त बाणाने पर्वताचे विंधन करतो : रावण होवोनि सावचित्त। बाण ब्रह्मवरद-दत्त[2]। तेणें विंधोनि पर्वत। शतधा छेदिला॥७०॥

सुग्रीवाच्या लत्ताप्रहाराने साश्वरथाचे भ्रमण : वृथा जातांचि पर्वत। सुग्रीवें रथीं दिधली लात। रथसारथि अश्वयुक्त। परिभ्रमत रणभूमीं॥७१॥ रथ भोंवतां चक्रान्वित। रावण जाला अति विस्मित। सुग्रीव बळिया बळिवंत। परम पुरुषार्थी कपिकुळीं॥७२॥ सुग्रीव उसळोनी गगना। पर्वत हाणितां रावणा। कोप आला दशानना। वरदबाणें विंधिलें॥७३॥

स सायकार्तो विपरीतचेतः कूजन्पृथिव्यां निपपात वीरः।
तं प्रेक्ष्य भूमौ पतितं विसंज्ञं नेदुः प्रहृष्टा युधि यातुधानाः॥१४॥
ततो गवाक्षो गवयः सुषेणो मैंदो गजो ज्योतिमुखो नलश्च।
शिलाः सुमुद्यम्य विवृद्धकायाः प्रदुद्रुवुस्तं प्रति राक्षसेंद्रम्॥१५॥
तेषां प्रहारान्स चकार मोघान्रक्षोऽधिपो बाणशतैः शिताग्रैः।
ते वानरेंद्रास्त्रिदशारिबाणैर्भिन्ना निपेतुर्भुवि भीमकायाः॥१६॥
ते वध्यमानाः पतिताश्च'शूराः संताड्यमाना भयशल्यविद्धाः।
ते वानरा रावणसायकार्ता जग्मुः शरण्यं शरणं स्म रामम्॥१७॥

रावणाच्या वरदबाणाने सुग्रीवास मूर्च्छा : वरदबाण आतुर्बळी। भेदतांच हृदयकमळीं। रामनामें देवोनियां आरोळी। पडिला भूतळीं सुग्रीव॥७४॥ सुग्रीवराजा पडतां क्षितीं। राक्षस जयजयकारें गर्जती। आमचा विजयी लंकापती। गुढियां उभारिती स्वानंदें॥७५॥ धूर पडताचि रणीं। रावण नेईल काढोनी। यालागीं वानरवीर श्रेणी। चहूंकडोनि पावत॥७६॥

रावणाला वानरसैन्याचा वेढा : शिळा शिखर वृक्ष पर्वत। वानर निजबळें हाणित। जाजावला[3] लंकानाथ। वानरीं रथ वेढिला॥७७॥ गुळासीं लागतीं माकोडे[4]। तैसीं रावणासीं माकडें। झोंबिन्नलीं चहूंकडे। मागें पुढें कवळोनि॥७८॥ चुकवी पुढिलांचें आघात। मागून वानर करिती घात। जंव मागिलां निवारित। तंव हाणित वामसव्य[5]॥७९॥ रावणाच्या अंगावरी। चालती वानरांच्या हारी। जाजाविला वनचरीं। न चले थोरीं बळाची॥८०॥

शब्दार्थ : १. त्री, २. ब्रह्मदेवाने वरप्रसंगी दिलेला, ३. पीडित झाला, ४. मुंग्या, डोंगळे बाजूंनी, ५. उजव्या डाव्या बाजूंनी.

अंगप्रत्यंगीं चौपासीं। मुंग्या झोंबती सर्पासी। त्यावरी बळ न चले त्यासी। तेंवी रावणासी कपिभारीं॥८१॥ रावण जंव बाण सोडी। एक वानर शीत[1] तोडी। एक बाणातें आसुडी। एक तो ओढी धनुष्यातें॥८२॥ सुग्रीव पडतां अचेतन। तयालागीं वानरगण। स्वयें वेंचूं पाहती प्राण। रणीं रावण वेढूनी॥८३॥ सुग्रीव न्यावया लंकेप्रतीं। उचलोनी घालूं पाहे रथीं। वानरीं वेंढिला लंकापती। विस्मित चीत्तीं रावण॥८४॥ पसरोनि विंशतिभुजाभारू[2]। कवळोनि मारितां वानरू। गगनीं उसळोनी सत्वरू। लहान थोरू निष्टले॥८५॥ मूर्च्छित पडतां मुख्य धूर। वेगीं पावले कपिकुंजर। करीत नामाचा भुभुःकार। वानरवीर ते एका॥८६॥ गज गवाक्ष गवय तिन्ही। सवेग आले पैं ठाकोनी। मैंद द्विविद वीर दोन्ही। रणनिर्वाणीं खवळले॥८७॥ सुदंष्ट्र वीर प्रबळ। नळ नीळ तार तरळ। वानर पावले सकळ। वृक्ष शिळा प्रबल पर्वत हस्तीं॥८८॥ मुख्य लक्षोनि रावण। वानरवीरीं मांडिलें रण। शिळा शिखरें द्रुम[3] पाषाण। रणकंदन लंकेशा॥८९॥ रणीं कोपोनि दशानन। सज्जोनियां धनुष्यबाण। तोडोनि द्रुम शिळा पाषाण। कपिकंदन मांडिलें॥९०॥ वानर आले अति वेगेंसीं। तोडोनि त्यांच्या आयुधांसी। बाण भेदूनि सपिच्छी। रणभूमींसीं पाडिले॥९१॥ विंधोनियां निर्वाणबाणीं। मुख्य धुरा पाडिल्या धरणीं। वानरवीरांचियां श्रेणी[4]। रणकंदनीं त्रासिल्या॥९२॥ अनिवार्य रावणबाण॥ वानरवीर रणीं त्रासून। सांडोनियां रणांगण। आले शरण श्रीरामा॥९३॥ सुवर्णपत्री भाळीं सुधारा। रणीं त्रासितां वानरां। शरण आले श्रीरामचंद्रा। जीवन[5] वानरां श्रीराम॥९४॥

ततो महात्मा स धनुर्धनुष्मानादाय रामः सहसा जागम ।
तं लक्ष्मणः प्रांजलिरभ्युपेत्य प्रोवाच वाक्यं परमार्थयुक्तम्॥१८॥
अहमार्य सुपर्याप्तो वधायास्य दुरात्मनः। वधिष्याम्यहमद्यैवमनुजानीहि मां विभो॥ १९॥
तमब्रवीन्महातेजा रामः सत्यपराक्रमः। गच्छ त्वं वचनं चेदं निबोध मम लक्ष्मण॥ २०॥
तस्य च्छिद्राणि मार्गस्व स्वच्छिद्राण्यपि लक्षय। चक्षुषा धनुषा चैव रक्षात्मानं समाहितः॥ २१॥
राघवस्य वचः श्रुत्वा संपरिष्वज्य पूज्य च। अभिवाद्य ततो रामं ययौ सौमित्रिराहवे॥ २२॥

श्रीरामचंद्राच्या अनुज्ञेने लक्ष्मण निघतात : रावणाचे दुर्धर बाण। वानर त्रासिले देखून। श्रीरामें घेवोनि धनुष्यबाण। युद्धा आपण निघाला॥९५॥ युद्धी निघतां रघुनंदन। लक्ष्मणें धांवोनि धरिले चरण। आजिंचे मज द्यावें रण। कृपा करून श्रीरामा॥९६॥ रावण बापुडें ते किती। तुवां न रिघावें युद्धार्थी। त्यासीं मी रणीं लावीन ख्याती। रणव्युत्पत्ती पाहें माझी॥ ९७॥ ऐकोंनी लक्ष्मणाचे वचन। संतोषला रघुनंदन। रावणांसी करावयां रण। बुद्धि संपूर्ण सांगत॥ ९८॥

लक्ष्मणास रामाचा उपदेश : रावणाची बुद्धि खोटी। रावण अतिशयें कपटी। त्यापासीं मायाकोटी। रणसंकटी सिंतरावया[6]॥ ९९॥ त्यासीं करावया रण। स्वयें व्हावें सावधान। दृढ राखोन अनुसंधान। विंधावे बाण अलक्ष्यलक्ष्यी॥ १००॥ देहीं न[7] फुटता[7] घावो। शत्रु जीवें मारावा पहा हो। हाचि धरानियां आवो। रणनिर्वाहो करावा॥१॥ ब्रह्मरूप अनुसंधान। ब्रह्मरूपी विंधितां बाण। ब्रह्मरूप आपणाआपण। हें रणांगण साधावें॥२॥ ऐसिया साधोनी रणरंगास। सांडोनी शरीराची आस। कळिकाळावरी घालोनी कांस। रणीं उदास विचरावें[8]॥३॥ मरणभय ज्याचे पोटीं। तो तंव शूर नव्हे सृष्टी। त्याची आशंका लागे

शब्दार्थ : १. धनुष्याची दोरी, २. वीस हात, ३. वृक्ष, ४. समुदाय, ५. आधार, ६. फसविण्याकरिता, ७. न लागता, ८. फिरावे.

त्यापाठीं। मरे शेवटीं निजभयें ॥४॥ चैतन्यतेजें लखलखाट। देहीं विदेहत्वाचा नेट। ऐसेनि धैर्ये अति सुभट। ते वीर श्रेष्ठ संग्रामी ॥५॥ तेथें न चले शठकपट। तेथें न चले मायेचें कचाट[1]। निर्देळे शत्रुपक्षसंकट। करी सपाट पापपुण्या ॥६॥ ऐकोनी श्रीरामवचन । लक्ष्मणा आनंद गहन। एका जनार्दना शरण। युद्ध दारूण अवधारा ॥१०७॥ स्वस्ति श्रीभावार्थ रामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सुग्रीवमूर्च्छापतनं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥ ओंव्या ॥१०७॥ श्लोक ॥२२॥ एवं ॥१२९॥

## अध्याय अठरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### नील व रावणाचे युद्ध

लक्ष्मणाचे रामांस वंदन करून प्रयाण: श्रीरामें निरूपण सांगून । बंधूसी पावली मूळींची खूण । घालोनियां लोटांगण। श्रीरामचरण वंदिले ॥१॥ वंदितां श्रीरामचरण। लक्ष्मणांसीं आलें स्फुरण । श्रीरामें देवोनी आलिंगन । धाडिला आपण संग्रामा ॥२॥

स रावणं वारणहस्तबाहुं ददर्श भीमोद्यतदीप्तचापम्।
प्रच्छादयंतं शरवृष्टिजालैस्तान्वानरान्बाणविकीर्णदेहन् ॥१॥
तमालोक्य महातेजा हनुमान्मरुतात्मजः। निवार्य शरजालानि विदुद्राव स रावणम् ॥२॥
रथं तस्य समासाद्य तोदमाक्षिप्य सारथे :। त्रासयन्रावणं धीमान्हनुन्मान्वाक्यमब्रवीत् ॥३॥
एष मे दक्षिणो बाहुः पंचशाखः समुद्यतः। विधमिष्यति ते देहे भूतात्मानं चिरोषितम् ॥४॥

वानरसैन्याला रावणापांसून पीडा : रावणाचें उग्र स्वरूप। अत्युग्र वाहोनियां चाप। अनिवार शरप्रताप । वानरदर्प भंगिला ॥३॥ रावणाच्या निजबाणीं। वानरां ज़ाली भंगाणी[2]। पाठिराखा नाहीं कोणी । रणमर्दनीं त्रासिले ॥४॥

हनुमंताचे रावणास आव्हान : श्रीराम आणि सौमित्र। करितां धर्मयुद्धविचार । रावणे त्रासितां वानर । हनुमान सत्वर पावला ॥५॥ रणी गर्जोनी मारुती। येतां देखोनी शीघ्रगती। रावणबाण जंव सज्जिती । तंव तो रथीं आदळला ॥६॥ बाण ओढावया पुरती। रावणा सवडी नुरेचि रिती। आसड[3]आसडुनियां मारुती । रथींचा सारथी घोळशिला[4] ॥७॥

रावणाचा मारुतीच्या उरावर आघात: हनुमान म्हणे रावणातें। पंचांगुळी दक्षिणहस्तें। तुझ्या मारीन भूतात्म्यातें। तळघातें हाणोनी ॥८॥ भूतात्मा तुझ्या देहाआंत। बहुकाळ वसिंनला अधर्मयुक्त। त्याचा करीन मी घात। दक्षिणहस्ताचेनि घायें ॥९॥ रावण म्हणे हनुमंता। शीघ्र करीं माझ्या निःपाता । तुझ्या देखोनी पुरुषार्था। मग तुझ्या घाता मी करीन ॥१०॥ जेव्हा मारिला अखयासुत। तेव्हांचि तुझा प्राणांत। आतां मेला ना जीत[5]। मिथ्या पुरुषार्थ तूं वल्गसी ॥११॥ ऐकोनी कपीच्या वाक्यातें। कोपें प्रज्वळोनी लंकानाथें। उरावरी हनुमंतातें। निष्ठुर घातें ताडिलें ॥१२॥ हृदयीं लागतां तळघात। उल्लास कपीच्या हृदयांत । करावया रावणाचा घात। स्वयें हाणित तळघातें ॥१३॥

आजघान च संकुद्धस्तलेनैवासुरद्विषम्। दशग्रीवः पपातोर्व्यां यथा भूमितलेऽचलः ॥५॥
संग्रामे तं तथा दृष्ट्वा रावणं तलताडितम्। ऋषयश्चारणा सिद्धा नेदुर्देवाश्च वानराः ॥६॥
अथाश्वस्य महातेजा रावणो वाक्यमब्रवीत्। साधु वानर वीर्य ते श्लाघनीयोऽसि मे रिपु : ॥७॥
रावणेनैवमुक्तस्तु मारुतिर्वाक्यमब्रवीत् । धिगस्तु मम वीर्यस्य यत्वं जीवसि रावण ॥८॥

---

शब्दार्थ : १. बंड, २. नाश, ३. ओढूओढून, ४. जर्जर केला, ५. जिवंत,

हनुमंताचा प्रतिकार व रावणास मूर्च्छा: हनुमंतें हाणितां करतळ। रावण होवानियां विव्हळ। भूकंपे उलथे अचळ[१]। तैसा विव्हळ लंवडला॥१४॥ चंद्री[२] लागली विसां नेत्रीं। खरसी[३] दाही मुखांतरी। रावण पडतांचि क्षितीवरी। निशाचरी आकांत॥१५॥ जाणोनि हनुमंत अति उद्भट। त्यासीं कां भिडों गेला दशकंठ। तेणे तळघातें केला शेवट। राज्यलोट लंकेचा॥१६॥ बोंब सुटली दळभारीं। बोंब सुटली निशाचरीं। बोंब सुटली लंकेमाझारीं। केली बोहरी हनुमंते॥१७॥

राक्षसांचा आक्रोश व मारुतीचा जयजयकार : आर्तुबळी वायुनंदन। पूर्वी जाळिलें लंकाभुवन। आतां मारिला दशानन। केले कंदन[४] राक्षसां॥१८॥ देखोनि हनुमंताची ख्याती। सुरवर जयजयकार करिती। असुर आंगवण वानिती। ऋषि स्तविती जयशब्दें॥१९॥ सिद्ध गंधर्व चारण। वानिती कपीची आंगवण। रणीं ढिलावला[५] रावण। बळ संपूर्ण हनुमंता॥२०॥ अदृष्टगतीचें[६] विंदान। कपीचेनि हातें नाहीं मरण। रावणाचा परतला प्राण। सावधान स्वयें जाला॥२१॥

शुद्धीवर आल्यावर रावणाचे मारुतीला धन्यवाद : रावण सावधान होतां। धन्य म्हणे हनुमंता। अप्रमेयबळ[७] पुरुषार्था। शौर्यश्लाघता तिहीं लोकीं॥२२॥ तुझ्याऐसें बळ सत्राण। इंद्रादि देवां नाहीं जाण। दानव मानव बापुडे कोण। तुझी आंगवण त्यां नाही॥२३॥ दैत्य म्हणविती अदट। ते तुझे वाटिवेचे भाट। तूं वीरा वीर वरिष्ठ। शौर्य श्रेष्ठ मी मानीं॥२४॥

हनुमंताचा अधिक्षेप: ऐकोनि रावणाचें वचन। हनुमान बोले लज्जायमान। जळो माझी आंगवण। घायें रावण न मारवेचि॥२५॥ माझा लागतां आघात। निःशेष मरावा लंकानाथ। तो तूं सावधान बोलत। धिक् पुरुषार्थ पैं माझा॥२६॥

तेन वानरवाक्येन कोपस्तस्य प्रजज्वले। स मुष्टिं पातयामास वज्रकल्पं महायशा ॥ ९॥
स तेनाभिहतो गाढं विसंज्ञो विह्वलोऽभवत्। विह्वलं तं तदा दृष्ट्वा हनूमंतं महाबलम्॥१०॥
रथेनातिरथः क्षिप्रं नीलं प्रतिसमाद्रवत्॥११॥

रावणाचा हनुमंतावर मुष्टिप्रहार : ऐकोनि हनुमंताचें वचन। रावण जाला कोपायमान। रागें वज्रमुष्टि वळोन। हाणी धांवोन हनुमंता॥२७॥ हृदयीं लागतां मुष्टिघात। नावेक[८] हनुमान मूर्च्छित। रावणाचा झणाणिला हात। व्यथाभूत रथावरी॥२८॥

हनुमान सावध होण्याआधीच रावणाची नीलावर स्वारी : मुष्टि हाणितां तडकला हात। तों हनुमान जाला सावचित्त। निमेषार्धे करील घात। निघे लंकानाथ अति धाकें॥२९॥ रण सांडोनी मागें जातां। उपहास लंकानाथा। रणीं चुकवावया हनुमंता। प्रेरी निजरथा नीळावरी॥३०॥ हनुमंतयुद्धसंकट। चुकवोनी रथ घडघडाट। नीळावरी आला दशकंठ। बाण उद्भट[९] वर्षत॥३१॥ रावण रणीं वर्षे बाण। नीळें हाणोनि पाषाण। रावणाचे बाण करी चूर्ण। रणविंदान[१०] दोहींचे॥३२॥

अंतकप्रतिमैर्बाणैः परमर्मविभेदिभिः। क्षिप्रमापीडयामास नीलं हरिचमूपतिम्॥१२॥
स शरौघं समायांतं नीलः परमदारुणः। गिरिशृंगं च शैलाभं रक्षोऽधिपतयेऽक्षिपत्॥१३॥
हनूमानपि तेजस्वी समाश्वस्तो महाबलः। समीक्ष्यमाणो युद्धेप्सुः सरोषमिदमब्रवीत्॥१४॥
नीलेन सहसा सक्तो रावणो राक्षसाधिपः। न न्याय्यं हि मया योद्धं क्षत्रधर्मवि जानता ॥१५॥

नील व रावण युद्धः रावण विंधी जे जे बाण। नीळें वर्षोनि पाषाण। अवघे करितां

शब्दार्थ : १. पर्वत, २. ताटकळी, ३. फेस, ४. नाश, ५. निर्बल केला, ६. प्रारब्धाचें, ७. अतुल पुरुषार्थयुक्त अशा. ८. क्षणभर, ९. भयंकर, १०. युद्धकौशल्य.

शतचूर्ण। रणीं रावण क्षोभला ॥३३॥ साधोनिया रणांगण। अंतकतुल्य[1] घेवोनि बाण। तोडून नीळाचे पाषाण। शर संपूर्ण विंधिले ॥३४॥ वर्मी भेदतांचि शर। तेणें क्षोभला वानर। मलयाद्रिसम गिरिवर। रागें सत्वर उपटिला ॥३५॥ न धरत न सांवरत रागें ठोकिला लंकानाथ। तेणें रावण अति विस्मित। पर्वतपात देखोनी ॥३६॥ श्रीरामाच्या निजदळीं। जो तो वानर आतुर्बळी[2]। पर्वत उपडोनी समूळीं। रणकल्लोळीं भिडताती ॥३७॥ मारिलें माझ्या प्रहस्तासी। तो सूड घेईन मी तुजपासीं। नीळ म्हणे रावणासी। तुज प्रहस्तासी भेटवीन ॥३८॥

मारुती शुद्धीवर आल्यावर नीळ व रावण यांचे द्वंद्व पाहात राहिला : तुम्हां दोघां जाहल्या भेटी। प्रहस्त सांगेल गुह्य गोष्टी। तेणें रावण क्षोभोनि पोटीं। शरवृष्टी वर्षत ॥३९॥ येरीकडे हनुमंत। मूर्च्छा शांतवून सावचित्त। रणीं मदार्वया लंकानाथ। असे पाहात साटोपे[3] ॥४०॥ रावण नीळेंसीं युद्धासक्त। तें देखोनि हनुमंत। स्वयं सांडी युद्धकंदनार्थ[4]। धर्मयुक्त विवेकी ॥ ४१॥ दोघे वीरीं एकजणासीं। युद्ध करणें पापराशी। यालागीं त्याजून रावणासी। श्रीरामापासीं कपि आला ॥४२॥ रावण आणि नीळ। दोघे जण रणप्रबळ। दोघे करिती रणकल्लोळ। दोघे कुशळ रणमारा ॥४३॥ नीळें टाकिला प्रचंड गिरी। रावणे नवबाणेंकरीं[5]। छेदून पाडिला धरेवरी[6]। शतधा[7] करी विखंड ॥४४॥

तद्विशीर्णाग्गिरेः श्रृंगं दृष्ट्वा हरिचमूपतिः। अन्यांश्च विविधान्वृक्षान्नीलश्चिक्षेप संयुगे ॥१६॥
स तानापततः शीघ्रं वृक्षांश्चिच्छेद रावणः। नीलस्याप्याहनद्गात्रे दर्शयंश्च स्वलाघवम् ॥१७॥
ह्रस्वं कृत्वा ततो रूपं ध्वजाग्रे निपपात ह। ध्वजाग्रे धनुषश्चाग्रे किरीटाग्रे च तं हरिम् ॥१८॥
सौमित्रि : सुगलो रामो हनूमान्विस्मयं गतः। रावणोऽपि महासत्त्वः कपिलाघवविस्मितः ॥१९॥
नीललाघवसंभ्रांतं दृष्ट्वा रावणमाहवे ॥२०॥

वृक्षांच्या वर्षावाने रावणाची धांदल : पर्वत छेदोनि प्रचंड। बाणीं केला खंडविखंड। नीळ कोपला वितंड। रावणबंड दंडावया ॥४५॥ नीळ होवोनि कोपायमान। वृक्ष घेतला बहुशाख जाण। दंडावया दशानन। दावी आपण हस्तवेग ॥४६॥ अश्वकर्ण शल्मली[8] शाल। चूत[9] चंपक तमाल ताल। खर्जूरी पोफळी सरळ। पिंपळ लघुलाघवें[10] ॥४७॥ जांबळी वेहकळी प्रचंड खैर। वृक्षीं त्रासला दशशिर। दुर्धर तरुवरांचा मार। रणीं धीर न धरवे ॥४८॥ एक वृक्ष जंव तोडित। तंव वृक्ष येती शातानुशत। जाजावला[11] लंकानाथ। रणी उसंत[12] घेवों नेदी ॥४९॥ वृक्ष आदळती शिरीं। वृक्ष आदळती उरावरी। वृक्ष आदळती भुजांवरी। धनुष्य करी धरूं नेदी ॥५०॥ अश्व हाणितां मुखावरी। सारथि पडला रथावरी। रथ भ्रमे चक्राकारी। भ्रमें चांचरी रावण ॥५१॥ सारथि मूर्च्छित रथावरी। अश्ववागोरे[13] कोण आंवरी। रथ भोंवे सैरावैरी। अपांपरी[14] रावणा ॥५२॥ नीळें ऐसऐशापरी। रावण त्रासिला तरुवरीं। रावणें लघुलाघवेंकरीं। नीळ शरधारीं विंधिला ॥५३॥

रावणाच्या बाणांचा वर्षाव चुकविण्यासाठी नीळाचं सूक्ष्म रूपधारण : रावण धनुर्वाडा अति दक्ष। विकट साधोनियां लक्ष। छेदोनि सांडिलें वृक्षेंवृक्ष। नीळ संमुख विंधिला ॥ ५४॥ रावणाचें बाणलाघव। नीळें लक्षोनिया सर्व। स्वयें झाला अति ऱ्हस्व। ऱ्हस्वान्व-यविंदानी[15] ॥५५॥ ऱ्हस्वरूपें नीळ वानरी। बैसला रावणाच्या ध्वजावरी। ध्वजीं विंधोनि जातां शरीं। धनुष्याग्रीं बैसला ॥५६॥

---

शब्दार्थ : १. यमासारखे, २. पराक्रमी, ३. प्रयत्नपूर्वक, ४. लढाई करणे, ५. नऊ बाण टाकून, ६. पृथ्वीवर, ७. शेकडो ठायी. ८. सावरीचे झाड, ९. आंबा, १०. थोर कुशलतेनें, ११. त्रासला, १२. विसांवा, १३. घोड्यांच्या दोऱ्या, १४. दुर्दशा, १५. लहान रूप धारण करण्यात कुशल,

**नीळाच्या सूक्ष्म रूपामुळे रावण गांगरतो :** धरूं जातां धनुष्याग्रीं। सवेंचि बैसे मुकुटावरी। धरूं जातां मुकुटाग्रीं। ध्वजाग्री आभासे॥५७॥ देखोनी नीळाचें चरित्र। गदागदां हासे सौमित्र। हनुमान सुग्रीव रामचंद्र। वानरवीर हांसती॥५८॥ ध्वजाग्रीं धनुष्याग्रीं। मुकुटाग्रीं बाणाग्रीं। सवेंचि भासत रथाग्रीं। नीळ निर्धारीं[1] लक्षेना॥५९॥ विस्मय मानी श्रीरघुनाथ। विस्मित हनुमंत सौमित्र। विस्मित वानर समस्त। नीळें लंकानाथ गांजिला॥६०॥ वीस बाहु वीस डोळे। रावण एकाग्र केला नीळें। युद्ध काय होतें तें न कळे। संभ्रांतमेळें तटस्थ॥६१॥ वानर मिशांसी घेती हिंदोळा। एक काढिती कंठमाळा। एक पदकें घालिती गळां। रावण भुलला संग्रामीं॥६२॥ एक आंसुडिती वीरकंकणें। एक घेती बाहुभूषणें। नीळें रावणें एकाग्र करणें। देह विसरणें संग्रामीं॥६३॥ एवं रणीं गांजोनि दशशिर। नीळें केला भुभुःकार। वानरांचा जयजयकार। केला गजर हरिनामें॥६४॥ ऐकोनि वानरांचा गजर। रणीं क्षोभला दशशिर। मारावया नीळ वानर। बाण दुर्धर वर्षला॥६५॥ रावणबाणांच्या आवर्ती। लक्षा न येचि सेनापती। शर सुटले सुनाट[2] जाती। लंकापति क्षोभला॥६६॥ नीळ जो कां सेनापती। आटोपेना शस्त्रावर्ती। मग दिव्यास्त्रें लंकापती। तद्वधार्थीं[3] प्रयोजी॥६७॥

> वानराणां प्रणादेन संकुद्धो रावणस्तदा। अस्त्रमाहारयामास दीप्तमाग्नेयमुत्तमम्॥२१॥
> आग्नेयास्त्रेण संयुक्तं गृहीत्वा रावणः शरम्। ध्वजशीर्षस्थितं नीलमुदैक्षत निशाचरः॥२२॥
> ततोऽब्रवीन्महातेज रावणो राक्षसेश्वरः। कपे लाघवयुक्तोऽसि मायया परया युतः॥२३॥
> त्वद्वजाय मया क्षिप्तः सायकश्चाभिमंत्रितः। जीवितं खलु रक्षस्य यदि शक्तोऽसि वानर॥२४॥
> एवमुक्तो महाबाहू रावणो राक्षसेश्वरः। संधाय बाणमस्त्रेण चमूपतिमताडयत्॥२५॥

**रावण अग्निअस्त्र सोडतो :** वानरांचा जयजयकार। ऐकोनि क्षोभला दशशिर। नीळ मारावया वानर। अग्निअस्त्र सज्जिलें॥६८॥ धगधगीत सज्जून बाण। रागें विंधितां रावण। नीळें होवोनि अणुप्रमाण। गेला उडोन ध्वजाग्रीं॥६९॥ नीळ नाढळे बाणासीं। अलक्ष्य लक्षेना लक्ष्यांसीं। अग्निअस्त्र न लागे त्यासीं। मनीं कुसुमुसी[4] रावण॥७०॥ नीळाची सूक्ष्म लाघवी गतीं। निर्बंधावया लंकापती। दमनीं अस्त्रप्रयुक्ती। नीळाप्रती प्रयोजी॥७१॥ दमनीं अस्त्रमंत्रप्रयुक्ती। नीळाची खुंटली सर्व शक्ती। अग्निअस्त्र घेवोनि हातीं। लंकापति गर्जत॥७२॥ लघुलाघवें सूक्ष्मगतीं। दाविसी नाना मायाव्युत्पत्ती। ते म्यां तुझी दंडिली शक्ती। रणाभिवर्ती मारावया॥७३॥ तुझा घ्यावया निजप्राण। म्यां सोडिला आहे बाण। पाहूं तुझी आंगवण[5]। आपणा आपण वांचवीं॥७४॥ नीळ लक्षोनि ध्वजाग्रीं। अग्निबाण घेवोनि करीं। रावण विंधी निजनिर्धारीं। रण गजरीं गर्जोनी॥७५॥ येतां देखोनि अग्निबाण। नीळा करितां न ये उड्डाण। मंत्रास्त्रें निजशक्ति क्षीण। हृदयीं बाण खडतरला॥७६॥ हृदयीं लागतांचि बाण। नीळ करी श्रीरामस्मरण। येतां येतां पळालें मरण। वरकांती बाण खडतरले॥७७॥ जेथें श्रीरामस्मरण। तेथें कल्पांतीं न रिघे मरण। नीळाचा वांचला प्राण। वरकांती बाण लागला॥७८॥

> शस्त्रयुक्तेन बाणेन नीलो वक्षसि ताडितः। निर्दह्यमानः सहसा निपपात महतिले॥२६॥
> विसंज्ञं वानरं दृष्ट्वा दशग्रीवो रणोत्सुकः। रथेनांबुदघोषेण सौमित्रिमभिदुद्रुवे॥२७॥

**रामनामस्मरणाने नीळ सुरक्षित रहातो :** लागतां अग्निअस्त्राघात। नीळ भूतळीं पडे मूर्च्छित। तेथेंही जालें विपरीत। अत्यद्भुत तें ऐका॥७९॥ अग्निअस्त्रें करावें घाता। तंव अग्नि नीळाचा

---

**शब्दार्थ :** १. निश्चयपूर्वक, २. व्यर्थ, ३. त्याचा वध करण्यास्तव, ४, कुरकुरे, ५. पराक्रम

पिता। तो न करीच प्राणघाता। नीळ तत्वतां[1] वाचला ॥८०॥ लागतां अग्निअस्त्राचा बाण। नीळें केलें रामस्मरण। घालोनियां वीरासन । मूर्च्छापन्न तो पडिला ॥८१॥ अग्निअस्त्राचा ताप शमोन। श्रीरामनामस्मरणें वोलावोन। नीळ सुखें मूर्च्छापन्न। सुखसंपन्न श्रीरामें ॥८२॥ वानर रामाचे निजभक्त। त्यांसी पडतां रणांआंत। सबाह्य प्रकटोनि रघुनाथ। रक्षी भक्त स्वानंदें ॥८३॥ अंतकाळींचा सोयरा रघुनाथ। शस्त्राभिघातीं सुखोन्मत्त। यापरी रक्षी निजभक्त। युद्धाआंत श्रीराम ॥८४॥ श्रीरामें सुखरूप रण। श्रीरामें नाठवे जन्ममरण। श्रीरामें वानरां समाधान। सुखसंपन्न संग्रामीं ॥८५॥ श्रीरामाचे निजसंगती। रणीं वानरां सुखसंवित्ती[2]। बाप कृपाळु रघुपती। संग्रामस्थितीं स्वानंद ॥८६॥

नीळास रावण लंकेत नेत असता लक्ष्मणाचे आगमन : नीळ सेनानी वीर सुभट। रणीं पडिला अति श्रेष्ठ। रथीं घालोनि घडघडाट। जाऊं स्पष्ट लंकेमाजी ॥८७॥ रावणें रणीं लावोनि ख्याती। धरोनि आणिला सेनापती। इतुकी तरी विजयवृत्ती। लंकेप्रती हो माझी ॥८८॥ रावणें जावें नीळेंसकट। तंव सौमित्र आला निकट। तेणे तळमळे दशकंठ। खोटें अदृष्ट हें माझें ॥८९॥ यशेंसी जावया आपण। वाडी नुरेचि अणुप्रमाण। युद्धा आलासे लक्ष्मण। निर्वाणकंदन हा करील ॥९०॥ लंकागमन राहिलें स्पष्ट। युद्ध करणे विचार श्रेष्ठ। रथ मुरडोनि घडघडाट। रागें दशकंठ परतला ॥९१॥ एक प्रद्युम्न एक शंबर। एक वृत्र एक देवेंद्र। तैसा रावणेंसीं सौमित्र। युद्धी सत्वर मिसळला ॥९२॥ सौमित्ररावणांचे रण। शस्त्रास्त्रीं विचित्र दारुण। एका जनार्दना शरण। श्रोतीं अवधान मज द्यावें ॥९३॥ नेणें पदबंधव्युत्पत्ती। नेणें कथेची संगती। रामायण वदवी रघुपती। कथाप्रयुक्ती प्राकृत ॥९४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां नीलरावणयुद्धप्रसंगोनाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥ ॥ ओंव्या ॥ ९४॥ श्लोक ॥२७॥ एवं ॥१२१॥

# अध्याय एकोणिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## रावणाचा पराजय

पूर्वप्रसंगाच्या अंतीं। नीळ मूर्च्छित पडिला क्षितीं। रावण मिरवी यश कीर्ती। गर्वोन्नति विजयाची ॥१॥

विसंज्ञं वानरं दृष्ट्वा दशग्रीवो रणोत्सुकः। रथेनांबुदघोषेण सौमित्रिमभिदुद्रुवे ॥१॥
तमाह सौमित्रिरदीनसत्त्वो विस्फारयंतं धनुरप्रमेयम्।
अवेहि मामद्य निशाचरेन्द्र न वानरांरत्वं प्रतियोद्धुमर्हसि ॥२॥
स तस्य वाक्यं प्रतिपूर्णघोषं ज्याशब्दमुग्रं च निशम्य राजा।
आसाद्य सौमित्रिमुपस्थितं तं रोषान्वितं वाक्यमुवाच रक्षः ॥३॥
दिष्ट्यासि मे राघव दृष्टिमार्गं प्राप्तोऽन्तगामी विपरीतबुद्धिः।
अस्मिन्क्षणे यास्यसि मृत्युलोकं संछाद्यमानो मम बाणजालै : ॥४॥

नीळाला नेत असता लक्ष्मणाच्या आगमनामुळे रावण परतला : श्रीरामस्मरणें सुखसंपन्न। नीळ निजसुखें मूर्च्छापन्न। त्यातें देखोनि विसंज्ञ[3]। दशानन विचारी ॥२॥ वानरांचा सेनापती। रावणें आणिला रणख्याती। ऐशी मिरवावया कीर्ती। नीळ लंकेप्रती स्वयें न्यावा ॥३॥ तंव

शब्दार्थ : १. खरोखर, २. आनंदाचा, सुखाचा अनुभव, ३. मूर्च्छित.

नीळाची सोडवण। करूं पावला लक्ष्मण। सज्जोनियां धनुष्यबाण । संमुख रावण लक्षूनी ॥४॥ रावण म्हणे निजचित्तीं। रामसैन्यीं वीर भद्रजाती। मज न लभे यश कीर्ती। ऊर्मिलापति[1] स्वयें आला॥५॥ आजि लक्ष्मणासीं रण। युद्ध करणें निजनिर्वाण[2]। ऐसा करानियां पण। स्वयें रावण परतला॥६॥

रावणाचा लक्ष्मणाकडून अधिक्षेप : मेघ गर्जती कडकडाट। तैसा रथाचा घडघडाड। लक्ष्मणेंसीं निकटानिकट। युद्धा दशकंठ स्वयें आला॥७॥ रावणासी म्हणे सौमित्र। लंकाधिपति तूं दशशिर। मस्तकीं ढळती छत्र चामर। त्या तुज वानर गांजिती॥८॥ जरी अंगी आहे आंगवण। तरी मजसीं करी पां रण। लक्ष्मणें साधिलें रणांगण। धनुष्यबाण सज्जूनी॥९॥ लक्ष्मणें करितां ज्याघोष[3]। नादें त्रासला लंकेश। जीवीं बैसला परम त्रास। वीरवित्रास[4] सौमित्र॥१०॥ ज्याघोष तळघोषेंसी जाण। ऐकोनि सौमित्राचें वचन। कोपें कोंदला दशानन। रणीं गर्जोन अनुवादे॥११॥ आजि माझें मनोरथ। शिवें संपूर्ण केले येथ। लक्ष्मण आला रणाआंत। करीन घात बाणें एकें॥१२॥ शूर्पणखीचे नाक कान। येणे छेदिले आपण। तिचें व्हावया उत्तीर्ण[5]। घेईन प्राण बाणें एकें॥१३॥ दृष्टीं पडतां लक्ष्मणासीं। बाणीं निर्दळून त्यासी। अवश्य धाडीन मृत्युपासीं। गर्जे आवेशीं रावण॥१४॥ ऐकोनि रावणाचें गर्जन। सौमित्र जाला हास्यवदन। करून दावीं रणविंदान। वृथा जल्पोन कार्य काय॥१५॥

जानामि वीर्यं तव राक्षसेंद्र बलं प्रतापं च पराक्रमं च।
अवस्थितोऽहं शरणचापपाणिरागच्छ किं मोघविकत्थनेन॥५॥
स एवमुक्तः कुपितः ससर्ज रक्षोऽधिपः सप्तशरान्सुपुंखान्।
तान्लक्ष्मणः कांचनचित्रपुंखैश्चिच्छेद बाणैर्निशितैः सुपत्रैः॥६॥
क्षुरार्धचंद्रोत्तमकर्णभल्लैः शरांश्च चिच्छेद न चुक्षुभे च।
स तान्प्रचिच्छेद निशाचरेंद्रं शितानशरान्लक्ष्मणमाजघान॥७॥

लक्ष्मणाकडून रावणाची निर्भर्त्सना : सौमित्र म्हणे दशानना। तुझें वीर्य शौर्य प्रताप पूर्ण। सर्वही मज आहे ज्ञान। सावधान अवधारीं॥१६॥ स्वयंवरीं वाहतां हरकोदंड[6]। तुझें जालें काळें तोंड। तरी वाढिवसी बळबंड। अति तूं लंड निःसंग॥१७॥ वाळीनें घोलोनि कांखेतळीं। केली सप्तसमुद्रीं आंघोळी। ता तूं म्हणवितोसी बळी। राक्षसकुळीं निःसंग॥१८॥ तूं निःसंगत्वाचा निखिल राशी। राजा आणि भीक मागसी। तोही कपटी कपटवेषी। परदारेसी हरावया॥ १९॥ राजा निजांगें चोरी करी। हे तुझ्या प्रतापाची थोरी। वाखाणिली दिगंतरीं। निःसंग संसारीं तूं एक॥२०॥ चोरी करूनियां परनारी। पळोनि लपसी लंकापुरीं। तरी वानिसी बळाची थोरी। निःसंग संसारीं तू एक॥२१॥ तुझ श्वेतद्वीपाप्रती। दासी लाता देवोनि नाचविती। हेही तुझी परम ख्याती। निर्लज्ज निश्चती तूं एक॥२२॥ कपटवेषें भीक मागतां। सीतेसी स्वयें म्हणविसी माता। तिसीच करूं पाहसी कांता। मातृगामिन महापापी॥२३॥ चोरीमारी परद्वारी। मातृगामी दुराचारी। इतुकीं ब्रीदें तुझ्या शिरीं। लाज संसारी तुज नाहीं॥२४॥ असो हा तुझा निंद्य वृत्तांत। माझा करीन म्हणसी घात। तो मी शरचापसमन्वित। युद्धाआंत उभा असें॥२५॥ रणीं करोनि दावी ख्याती। त्यातें वीर शूर प्रतापी म्हणती। जें कां वृथा बडबड करिती। त्यांतें निंदिती अधमत्वें॥२६॥ सज्जूनियां

शब्दार्थ : १. लक्ष्मण, २.-निकराचे, ३. धनुष्याचा टणत्कार, ४. शत्रूकडील वीरांना त्रासविणारा, ५. ऋणमुक्त, ६. शिवधनुष्य.

धनुष्यबाण। म्यां साधिलेंसे रणांगण। माझा घेणें आहे प्राण। यावें आपण संग्रामा॥२७॥ शूर्पणखीचे नाक कान। छेदिलें हें कर्म सामान्य। नाककानेंसी दशानन। आजि छेदीन संग्रामीं॥२८॥ रावणा ऐकें माझी गोष्टी। संग्रामीं देवों नको पाठी। मग मी न लगें तुझ्या पाठीं। कडकडाटीं झुंझावें॥२९॥

लक्ष्मण व रावणांचे अस्त्रयुद्ध : ऐकतां सौमित्राचें वचन। हृदयीं पोळला दशानन। सुवर्णपत्री निर्वाणबाण। विंधी दारुण शर सप्त॥३०॥ रावणाचें सातही बाण। हेळा[1] सौमित्र सांडी तोडून। तेणें क्षोभला रावण। असंख्य बाण वर्षला॥३१॥ ज्या बाणांच्या कडोविकडीं। सुरासुर पाडिले निर्वडी[2]। ते ते बाण सौमित्र तोडी। जेंवी सर्पकोडी खगेंद्र[3]॥३२॥ गरुड छेदी भुजंगभार[4]। तेंवी रावणाचे दुर्धर शर। रणीं पसरले अपार। तेणें दशशिर गजबजित॥३३॥ तेचि समयीं सौमित्र। निर्दाळावया दशशिर। सुवर्णपत्री सुपुंख[5] शर। विंदिले विचित्र ते ऐका॥३४॥ सुरूप भांळी सतेज शर। नाराच[6] नाळीक[6] अर्धचंद्र। सवेग विंधितां सौमित्र। बाणीं जर्जर लंकेश॥३५॥ तरी बळियाढा रावण। निवारोनि लक्ष्मणाचे बाण। घ्यावया लक्ष्मणाचा प्राण। अस्त्र निर्वाण प्रयोजी॥३६॥ काळी कराळी कंकाळास्त्र। देहदमनी दाहकास्त्र। अखंडास्त्र विखंडास्त्र। दंडे दंडास्त्र मारक॥३७॥ चंडास्त्र ग्रचंडास्त्र। दंडास्त्र विततंडास्त्र। घातनास्त्र पातनास्त्र। निमेषं सौमित्र निवारी॥३८॥ निर्वाणास्त्र अति क्रूर। ज्याचेनि होय सर्व संहार। रागें मोकली दशशिर। तें सौमित्र निवारी॥ ३९॥ निर्वाणास्त्रें माझीं समस्त। हेळां सौमित्रें केलीं व्यर्थ। रावण चुरी दोनी हस्त। दांत खांत करकरां॥४०॥ हृदयीं आली आठवण। ब्रह्मदत्त वरदबाण। रणीं मारावा लक्ष्मण। रागें रावण विंधित॥४१॥

> शरेण कालाग्निसमप्रभेण स्वयंभुदत्तेन ललाटदेशे।
> स लक्ष्मणो रावणसायकार्तश्चाल चापं शिथिलं प्रगृह्य॥८॥
> पुन:स संज्ञां प्रतिलभ्य कृच्छ्राच्चिच्छेद चापं त्रिदशेंद्रशत्रो:।
> निकृत्तचापं त्रिभिराजघान बाणैस्तदा दाशरथि: शिताग्रै:॥९॥
> स सायकार्तो विचचाल राजा कृच्छ्राच्च संज्ञां पुनराससाद।
> स कृत्तचाप: शरताडितश्च मेदार्द्रगात्रो रुधिरावसिक्त :॥१०॥

रावणाच्या ब्रह्मदत्त वरदबाणाने लक्ष्मणाचा वेध : ब्रह्मदत्त वरदबाणांसी। रावण विंधी रणाभिवेषीं। लक्ष्मण निवारीचना त्यासी। वंदिली शिसीं ब्रह्माज्ञा॥४२॥ श्रीराम आणि लक्ष्मण। अन्यथा न करिती ब्रह्मवचन। ललाटीं वंदिला वरद बाण। दिसे संपूर्ण रुतलासा॥४३॥ ब्रह्मवराचा वरदहस्त। बाण नव्हेती गंधाक्षत्त। सौमित्रासी रणाभिषिक्त। स्वानंदें करित स्वयंभू॥४४॥ पुढील कथेची महिमा भारी। बाण खडतरताचि[7] शिरी। लक्ष्मणधैर्याची थोरी। मूर्च्छा सांवरी येतयेतां॥४५॥ धनुष्याग्र लावोनि शिरापुढां। मूर्च्छा सांवरी वीर गाढा। सवेग उठोनि वेगाढा। सज्जिला मेढा शरवृष्टी॥४६॥ शिथिल चाप शिथिल दर्प। शिथिल युद्धखटाटोप। ते काळीं सौमित्रिप्रताप। धरी साटोप तें ऐका॥४७॥ सौमित्राची शौर्यथोरी। रावण विंधितांचि शरीं। एक उरीं एक शिरीं। एक चापकरीं छेदिले॥४८॥ भयें स्वेदसकंपशरीर। सर्वांगीं वाहे रुधिर। सौमित्रें दशशिर। केला जर्जर बाणजाळें॥४९॥ छिन्नधन्वा[8] लंकानाथ। लागतां बाणांचा आघात। चांचरी जात गडबडित। पडत पडत सांवरी॥५०॥ वृथा गेला वरदबाण। रणीं न मरेचि लक्ष्मण। तेणें क्षोभला रावण। शक्ति दारूण स्वयें सज्जी॥५१॥

शब्दार्थ : १. लीलेने, २. कौशल्याने, ३. गरुड, ४. सर्पसमूह, ५. उत्तम पिसाऱ्याचे, ६. बाणविशेष. ७. लागताच, ८. धनुष्य मोडले आहे असा.

जग्राह शक्तिं सहसा सुचण्डां स्वयम्भुदत्तां युधि देवशत्रुः।
स तां सधूमानलसन्निकाशां वित्रासनीं वानरराक्षसानाम् ॥११॥
चिक्षेप शक्तिं सहसा ज्वलंतीं सौमित्रये राक्षसराजसिंहः।
प्रदीप्यमानां रघुनन्दनस्तां जघान बाणैरनलप्रकाशैः ॥१२॥
तथापि सा तस्य विवेश शक्तिर्भुजांतरं दाशरथेर्विशालम् ॥१३॥
शक्त्या तया स सौमित्रिस्ताडितोऽपि स्तनांतरे।
विष्णोरमीमांस्यभागमात्मानं प्रति सोऽस्मरन् ॥१४॥

रावणाकडून ब्रह्मशक्तीचा उपयोग : ब्रह्मयानें दिधली निर्वाणार्थी। ब्रह्मयाची ब्रह्मशक्ती। अनिवार त्रिजगतीं। लक्ष्मणवधार्थी मोकली[1]।।५२।। रावणें सोडितांचि शक्तीसी। कोटिसूर्यसमप्रकाशी। कडाडिली पैं आकाशीं। तेज चौपासीं न समाये।। ५३।। तेजें राक्षसां पडिपाडीं[2]। वानरां पडली झांपडी। उभय सेना त्रासली बापुडी। शक्तिकडाडी सभ्रांत ।।५४।। शक्ति तेजें देदीप्यमान। नादें कडाडितां गगन। लक्ष्मण ते काळीं सावधान। शरचापबाण सज्जूनी ।।५५।। शक्ति येतां अति प्रचंड । लक्ष्मणाचें बळ वितंड[3]। बाणीं करोनि शतखंड। शक्तिचे तोंड ठेंचिलें।।५६।। मागें ने सरे ब्रह्मशक्ति। पुढें न निघवे बाणाहातीं। जाजावली रणावर्ती। वांचती गति दिसेना ।।५७।। लक्ष्मणाचा करावा घात। तो राहिला शक्तिपुरुषार्थ। शक्तिसीं आला प्राणांत। वीर विख्यात सौमित्र।।५८।।

शक्तिच्या शरणागतीस मान देऊन लक्ष्मण ती स्वतःवर घेतो : अचुक लक्ष्मणाचे बाण। चुकवितां न चुकती जाण। शक्ति सौमित्राला शरण। माझा प्राण वांचवीं।।५९।। शरणागता नाहीं मरण। हें तंव तुमचें ब्रीद संपूर्ण। वांचवावया निजप्राण। शक्ति लोटांगण स्वयें घाली ।।६०।। दृढ ब्रह्मचारी तूं लक्ष्मण। मी ब्रह्मयाची ब्रह्मशक्ति जाण। तुझे हातें कन्यारत्न। हृदयीं संपूर्ण सांठवी।।६१।। तूंचि माता तूंचि पिता। मी जालें तुझी दुहिता। लक्ष्मणा कृपावंता। माझ्या घाता करूं नको।।६२।। शक्तिनें म्हणतांचि शरण। लक्ष्मणें विंधों सांडिले बाण। शक्तिसी दे हृदयस्थान । कृपाळु पूर्ण शरणागता।।६३।। शक्तीनें देतांचि आलिंगन। होईल परदारस्पर्शन । लक्ष्मणें सांडोनि देहाभिमान। जाला परिपूर्ण परब्रह्म।।६४।।

लक्ष्मणास मूर्च्छा : जेथें नाहीं पुरुषप्रकृती । जेथें नाहीं शिवशक्ती। लक्ष्मण राहिला ते अद्वैती। सहजस्थिती स्वानंदें।।६५।। लक्ष्मण पावला विश्रांती। निर्मुक्त केली ब्रह्मशक्ती। श्रीरामभजनाची हे ख्याती। सकळ विश्रांति श्रीरामें।।६६।। धर्मयुद्धाची निजनीती। पूर्वी शिकविली रघुपती। लक्ष्मण राहिला तेचि गतीं। सहजस्थितीं स्वानंदे।।६७।। घातूं आली ब्रह्मशक्ति। तिसीं दिधली नित्य मुक्ती। धन्य संतांची संगती। सुखसंवित्ती[4] घातका।।६८।। बाह्यकथेची अनुवृत्ती[5]। म्हणती योद्धा लंकापती। लक्ष्मण भेदूनि शक्ति। पडिला क्षितीं[6] मूर्च्छित।।६९।।

विसंज्ञं पतितं दृष्ट्वा सौमित्रिं राक्षसेश्वरः। अवतीर्य रथात्तूर्णमभिदुद्राव लक्ष्मणम् ॥१५॥
ततो दानवदर्पघ्नं सौमित्रिं देवकंटकः। तं पीडयित्वा बाहुभ्यां न प्रभुर्लंघनेऽभवत् ॥१६॥
हिमवान्मंदरः शैलः कैलसश्च महाचलः। शक्यो भुजाभ्यां संवोढुं न त्वयं राघवानुजः ॥१७॥
आश्वस्तवक्ष विशल्यश्च लक्ष्मणः शत्रुसूदनः। विष्णोर्भागममीमास्यमात्मानं प्रत्यनुस्मरन् ॥१८॥

मूर्च्छित लक्ष्मणास नेण्याच्या प्रयत्नामध्ये रावणाचे दौर्बल्य : विसंज्ञ[7] देखोनि लक्ष्मण। रथाहूनि उडोनि रावण। सवेग येवोनियां आपण। मुष्टिघातें पूर्ण ताडिला ।।७०।। रावणें हाणिता

शब्दार्थ : १. सोडली, २. बरोबरच, ३. प्रचंड, विशाळ, ४. सुखानुभव, ५. संबंध, ६. पृथ्वीवर , ७. मूर्च्छित, निश्चेष्ट.

मुष्टिघात। झणाणिले दोनी हस्त। धापां दाटला लंकानाथ। पडत पडत सांवरी ॥७१॥ लक्ष्मणा हाणितां मुष्टिघात। माझा होऊं पाहे प्राणांत। त्यासीं न्यावें लंकेआंत। परम पुरुषार्थ हा माझा ॥७२॥ मुख्य धूर लक्ष्मण। रथीं घालितां रावण। त्यासीं नुचले तो अणुप्रमाण। सर्वशक्तीं पूर्ण शिणतांही ॥ ७३ ॥ एके दोनी चौ हातीं। लक्ष्मण नुचले लंकापती। सात पांच दहाही हातीं। विसां हातीं कुंथत ॥७४॥ लक्ष्मणायेवढी धूर प्राप्त। माझेनि न नेववे लंकेआंत। कपाळ पिटी लंकानाथ। अभागी निश्चित मी एक ॥७५॥ लक्ष्मण न मरे मुष्टिघाता। लंके न नेववे घालोनि रथा। यासीं करितां शस्त्रघाता। शस्त्रें वृथा स्वयें जाती ॥७६॥ शस्त्रें हाणिता आकाशासी। जेंवी न रूपती तयासीं। तेंवी शस्त्रपात लक्ष्मणासी। अंग घायेंसीं आढळेना ॥७७॥ आकाशमोट बांधूं जातां। जेंवी चौपलवी[१] ये हाता। तेंवी लक्ष्मणासी उचलितां। लंकानाथा अति लज्जा ॥ ७८॥ भाग्यें सांपडला येथ। न चले मुष्टिघात शस्त्रपात। न नेववे लंकेआंत। तळमळित रावण ॥७९॥ लक्ष्मणें सांडितां देहअहंता[२]। देहीं कोंदली ब्रह्मरूपता। तेणें तो नुचले लंकानाथा। स्वयें कुंथतां [३]साटोपें ॥८०॥ रावण विस्मित मानसीं। म्हणे शिवासगट कैलासासी। म्यां आंदोळिलें निजबळेंसी। परी लक्ष्मणासी नुचलवे ॥८१॥ मेरू मंदार गिरिवर। निमेषे उचलीन मी दशशिर। परी नुचलवे हा सौमित्र। रामानुचर बळिष्ठ ॥८२॥ अचेतन[४] पडिला लक्ष्मण। त्यासीं न चले आंगवण। जळो माझें रावणपण। आपणा आपण निर्भत्सी ॥८३॥ लक्ष्मणासी धरितां लंकानाथ। कोपें खवळला हनुमंत। वज्रपाय मुष्टिघात। स्वयें हाणित लंकेशा ॥८४॥

ततः क्रुद्धौ वायुसुतो रावणं समभिद्रवत् । आजघानोरसि न्यूढे वज्रकल्पेन मुष्टिना ॥१९॥
तेन मुष्टिप्रहारेण रावणो भीमविक्रमः। जानुभ्यां न्यपतद्भूमौ चचाल निपपात च ॥२०॥
विसंज्ञं रावणं दृष्ट्वा समरे भीमविक्रमम्। ऋषयो वानराश्चैव नेदुर्देवाश्च सासुराः ॥२१॥
हनुमानपि तेजस्वी लक्ष्मणं शुभलक्ष्मणम्। आनयद्राघवाभ्याशं बाहुभ्यां परिगृह्य वै ॥२२॥
वायुसूनोः सुहृत्त्वेन भक्त्या परमया च सः । अकंप्योऽपि हि शत्रूणां लघुत्वमगमत्कपेः ॥२३॥

**हनुमंताच्या मुष्टिप्रहाराने रावणास मूर्च्छा :** लक्ष्मण होतां मूर्च्छान्वित। लंके नेऊं पाहे लंकानाथ। तेणें कोप येवोनि हनुमंत। दे मुष्टिघात लंकेशा ॥८५॥ तेणें मुष्टिघातें रावणांसी। गुडघे आदळोनि भूमीसीं। पालथा पडिला तोंडघसीं। मोकळ्या केशीं विसंज्ञ ॥८६॥ बळिया बळी लंकानाथ। ज्यासी सुरासुर नित्य कांपत। त्यासीं लागतां वानरघात। पडे मूर्च्छित[५] लंकेश ॥८७॥ रावणें पडतां मूर्च्छित। वानर रामनामें गर्जत । सुरासुर जयजकार करित। ऋषि वदत पुरुषार्था ॥८८॥

**हनुमंताचा सर्वत्र जयजयकार :** देखोनि हनुमंताचे बळ। स्वर्ग मृत्यु पाताळ। जयजयकारीं गर्जती सकळ। राक्षसदळ खवळलें[६] ॥८९॥ राक्षसदळीं हाहाकार। पुढें जो जो जाईल वीर। त्यासी कपि करील संहार। द्वंद्वी[७] वानर राक्षसां ॥९०॥

**लक्ष्मणास मारुती रामाकडे नेतो :** विकळ पाडोनि रावणासी। हनुमंत गेला लक्ष्मणापासीं। उचलोनियां सावकाशीं । श्रीरामापासी आणिला ॥९१॥ होतां श्रीरामदर्शन। ब्रह्मशक्तीतें उद्धरोन। सौमित्र जाला सावधान। अगाध महिमान भक्तीचें ॥९२॥ भक्तीपासीं यश कीर्ती। भक्तीपासीं शांति विरक्ती । भक्तीपासीं ब्रह्मस्थिती। स्वानंदे वर्तती सर्व कर्मी ॥९३॥ भक्तीस विकला भगवंत। भक्ताचे उच्छिष्ट स्वयें काढित। रणांगणीं घोडे धूत। शेखीं होत

शब्दार्थ : १. झोळी, वस्त्र, २. देहाभिमान, ३. मोठ्या यत्नाने, ४. निश्चेष्टित, ५. बलवंतांत बलवंत, ६. खळबळले
७. लढणारा.

द्वारपाळ ।।९४।। भक्तसांकडीं समस्त । सदा सोशी भगवंत। ते भक्ति हनुमंतांत। सप्रेम वर्तत स्वानंदे ।।९५।। विसां हातीं स्वयें रावण। शिणतां नुचलेचि लक्ष्मण। तोचि हनुमंतें आपण। पुष्पप्राय जाण उचलिला ।।९६।। अभक्ता जो दुर्धर नेमस्त। तो भक्ता जड नव्हे भगवंत। यालागीं पुष्पप्राय हनुमंत। स्वयें उचलित सौमित्र ।।९७।। होतां श्रीरामदर्शन। सौमित्र जाला सावधान। वानरां उल्लास पूर्ण। केलें गर्जन रामनामें ।।९८।।

रावणोऽपि महातेजाः प्राप्य संज्ञा महाहवे। आददे निशितान्बाणान्जग्राह विपुलं धनुः ।।२४।।
अस्वस्थश्च विशल्यश्च लक्ष्मणः शत्रुसूदनः। एतस्मिन्नंतरे वीरो दृष्ट्वा रावणविभ्रमम् ।।२५।।

लागतां हनुमंताचा हात। रावण पडला होता मूर्च्छित। तो होवोनि स्वयें स्वस्थ। शरचापयुक्त रथी बैसे ।।९९।।

**लक्ष्मण सावध होतो :** येरीकडे लक्ष्मण। स्वयें होवोनि सावधान। सज्जोनियां धनुष्यबाण। पाहे रावण युद्धार्थी[1] ।।१००।। मज हाणोनि ब्रह्मशक्ती। केऊता[2] गेला लंकापती। त्यासी रणीं लावोनि ख्याती। बाणावर्ती[3] मारीन ।।१।। माझे लागलिया बाण। रणीं वांचला रावण। हें मज उणेपण। घेईन प्राण बाणें एकें ।।२।। सोडूनियां बाणवर्त। रणीं रावणासीं करीन घात। लक्ष्मण चालिला गर्जत। शरचापयुक्त साटोपें ।।३।। लक्ष्मण निघतां उल्लासेंसी। श्रीरामे धरिला पोटासीं। अति प्रीतीं प्रेमेंसी। गुह्य त्यापासीं सांगत ।।४।। रणीं मारावा दशानन। माझी प्रतिज्ञा हें प्रमाण। प्रतिपाळावी आपण। रणीं रावण मज द्यावा ।।५।। तुवां करितांचि रण। निमेषें मारशील रावण। माझी प्रतिज्ञा होऊं नेदीं शून्य[4]। सखा संपूर्ण तूं माझा ।।६।। किती रावणाचें बळ। रणमाराचें कैसें सळ[5]। तुकोन[6] पाहूं दे एक वेळ। संग्रामशीळ तयाचें ।।७।। ऐकोनि श्रीरामाचें वचन। सौमित्र घाली लोटांगण। श्रीरामा देवोनि रावण। वंदूनि चरण परतला ।।८।।

लक्ष्मणं च समाश्वस्तं सैन्यं च मुदितं पुनः। निपातितानां वीराणां वानराणां महाचमूः ।।२६।।
दृष्ट्वा रामो रणं गत्वा प्रत्ययाद्रावणं युधि। आयांतमुपसंगम्य हनूमान्वाक्यमब्रवीत् ।।२७।।
राम पृष्ठं समारुह्य जह्येनं पापराक्षसम्। श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामो दाशरथिस्ततः ।।२८।।
एवमुक्तस्तथेत्युक्त्वा समारुह्य प्लवंगमम् ।।२९।।

**लक्ष्मणाला थांबवून श्रीराम रावणावर चाल करितात :** स्वस्थ राखोनि सौमित्रासी। संग्रामा निघतां श्रीरामासीं। युद्ध करावया रावणासीं। वानरांसी उल्लास ।।९।। वानर घायीं अतिनिर्बुज[7]। लाविती श्रीरामचरणरज। अवघे होवोनि नीरुज[8]। नाचती भोजें[9] संग्रामीं ।।११०।। करितां श्रीरामनामस्मरण। वानरां बाधेना जन्ममरण। येणें निःशंकपणें जाण। रावणीं रण करूं येती ।।११।। मांडून माहेश्वरी ठाण। सज्जूनियां धनुष्यबाण। संमुख लक्षोनियां रावण। श्रीराम रण करूं आला ।।१२।। श्रीराम करितां रणगर्जन। कांपिन्नलें त्रिभुवन। हडबडिला दशानन। राक्षससैन्य खळबळिलें ।।१३।।

**हनुमंताच्या विनंतीवरून श्रीराम त्याच्या पाठीवर आरूढ होतात :** रावण रथी श्रीराम विरथी। देखोनि क्षोभला मारुती। येवोनियां श्रीरामाप्रती। करी विनंती अति नम्र ।।१४।। रणीं मर्दावया रावण। स्वयें स्वामीनें कृपा करून। माझे पृष्ठीं करावें आरोहण। म्हणोनि चरण दृढ धरिले ।।१५।। ऐकोनि हनुमंताची विनंती। संतोषला श्रीरघुपती। हनुमंताचे पृष्ठाप्रती। शौर्यशक्ति बैसला ।।१६।। गरुडासन वृषभासन। इंद्र ऐरावतीं आरोहण। अवघे दिसती

**शब्दार्थ :** १. युद्ध इच्छिणार, २. कोठे, ३. बाणांच्या माऱ्याने, ४. वृथा, ५. आग्रह, ६. परीक्षून, तोलून, ७. मूर्च्छित, ८. व्याधिरहित, ९. आनंदाने.

तृणासमान। श्रीरामासन कपिपृष्ठीं ॥१७॥ आधींच हनुमंत परम शूर। तो जाला श्रीरामा रहंवर[1]। त्यावरी बैसला श्रीरामचंद्र। आला संहार राक्षसां ॥१८॥ चालता बोलता रथ। स्वयें जालासे हनुमंत। आला राक्षसांसी अंत। रणप्राणांत[2] रावणा ॥१९॥ पशु अश्व जुंपिता रथीं। त्यापासीं पाहिजे सारथी। तो नाहीं श्रीरामरथीं। एकला मारुति रथयंता[3] ॥१२०॥

राघवः समराकांक्षी हंतुकामस्तु रावणम्। गंभीरोदग्रया वाचा राक्षसेंद्रमुवाच ह ॥३०॥
तिष्ठ तिष्ठ मम त्वं हि कृत्वा विप्रियमीदृशम्। क्व नु राक्षसशार्दूल गत्वा मोक्षमवाप्स्यसि ॥३१॥
यदींद्रवैवस्वतभास्करान्वा स्वयंभुवैश्वानरशंकरान्वा।
गमिष्यासि त्वं दशधा दिशो वा तथापि नैवाद्य गतो विमोक्ष्यसे ॥३२॥

**श्रीरामांकडून रावणाची निर्भर्त्सना :** रणीं मर्दावया दशानन। सकोप कोपे रघुनंदन। गिरा गंभीर गर्जोन। काय आपण बोलत ॥२१॥ चोरोनियां सीता सुंदरी। येवोनि लपसी लंकापुरीं। माझ्या दृष्टी पडल्यावरी। कैशा परी वांचसी ॥२२। माझे लागलिया घाय। तुज कोण राखेल माय। सुरासुर जाल्या साह्य। तरी पाहें सोडीना ॥२३॥ इंद्र चंद्र वरुण कुबेर। यम वायु वैश्वानर[4]। माझे देखोनि दुर्धर शर। सुरासुर कांपती ॥२४॥ माझे सुटल्या बाण। दशदिशा पळतां जाण। कोणी राखों न शके प्राण। अलोट मरण तुज आलें ॥२५॥ माझे सुटल्या बाण। धाकें सुरवर सांडिती प्राण। तेथोनि तुज राखेल कोण । अलोट मरण तुज आलें ॥२६॥ जन्मोनियां ब्रह्मवंशीं। महापापी तूं जालासी। ब्रह्मा क्षोभलासे मानसीं। राक्षसांसी प्रळयांत ॥२७॥ चोरीमारी परदारी[5]। इतुकीं पापें रावणा तुझे शिरीं। तेणें ब्रह्मा क्षोभला भारी। निशाचरी प्रळयांत ॥२८॥ माझे सुटलिया बाण। ब्रह्मा बापुडें ब्राह्मण। त्यासीं नव्हे निवारण। अलोट मरण तुज आलें ॥२९॥ रावणा तूं तंव पापमूर्ती। अति उन्माद[6] विषयासक्ती। भोग मागतां पार्वती। शिव तुजप्रती क्षोभला ॥१३०॥ स्वामीची जे निजकांता। ते तंव सेवकाची निजमाता। मातृगामी तूं लंकानाथा। उमा[7] मागतां प्रळयांत ॥३१॥ चोरितां श्रीरामाची दारा[8]। परम क्षोभ श्रीशंकरा। निर्दाळावया निशाचरां। प्रळयरुद्रा प्रेरिलें ॥३२॥ ऐकोनि श्रीरामवचन। हृदयीं खोंचला दशानन। हनुमंतावरी दुर्धर बाण। रागें रावण विंधित ॥३३॥

राघवस्य वचः श्रुत्वा राक्षसेंद्रो महाकपिम् आजघान शरैस्तीक्ष्णैः कालवैश्वानरापमैः ॥३३॥
ततो रामो महातेजा रावणेन कृतं व्रणम्। दृष्ट्वा प्लवंगशार्दूलं क्रोधस्य वशमभ्यगात् ॥३४॥
तस्याभिसंगम्य रथं सचक्रं साश्वध्वजच्छत्रमहापताकम्।
ससारथिं साशनिशूलखड्गं रामः प्रचिच्छेद शरैः सुतीक्ष्णैः ॥३५॥

**राम-रावण यांचे युद्ध :** तीव्र बोलतां रघुनाथ। हृदयी पोळला लंकानाथ। करावया हनुमंताचा घात। बाण सज्जित साटोपें ॥३४॥ खंडोनि माझी रथगती। सव्यासव्य चक्राकृती। रणीं विचरतो मारुती। दुर्धर शक्ती वानरा ॥३५॥ येणें मारिला अखयासुत। इंद्रजित केला हताहत[9]। मुख्य द्वंद्वी[10] हा हनुमंत। याचा घात मी करीन ॥३६॥ माझ्या रथासीं समान। येणें आणिला रघुनंदन। याचे करीन मी हनन। सवर्म बाण विंधोनी ॥३७॥ अडकलाहे श्रीरामातळीं। उडोन जाऊं न शके बळी। तंव मी याची करीन होळी। बाणजाळीं विंधोनि ॥३८॥ ऐसें बोलोनि दशशिर। बाण घेवोनि दुर्धर। रणीं लक्षोनियां वानर। शर सत्वर विंधिला ॥३९॥ लागतांचि जीवीं। हनुमान निर्द्वंद्व[11] सर्वभावीं। रावणातें वांकुल्या दावी। घायाची बाण

शब्दार्थ : १. रथ, २. रणांत मरण, ३. रथ आणि सारथी, ४. अग्नी, ५. परस्त्रीहरण, ६. ताठा, ७. पार्वती, ८. स्त्री. ९. जर्जर, १०. शत्रू, ११. सुखदुःखरहित.

पदवी पोंचट ॥१४०॥ बाण नव्हेती सुमनमाळा[1]। तुवां घातली माझें गळां। घायें उल्लास गोळांगुळा[2]। राक्षसदळा दंडावया ॥४१॥ हें ऐकोनि दशशिर। बाण घेऊनि दुर्धर। रणीं लक्षोनि वानर। शर सत्वर विंधित ॥४२॥ हनुमान जाला श्रीरामरथ। पुच्छें राक्षससैन्यघात। मुख्य धुरांतेंचि घोळसीत[3]। रणकंदनार्थ कपिपुच्छ ॥४३॥ कपिपुच्छाचा दुर्धर मार। राक्षसदळीं हाहाकार। तेणें दचकला दशशिर। रणीं वानर नाटोपे ॥४४॥ हनुमंतासीं बाणघात। देखोनियां रुधिरोक्षित[4]। रणीं कोपला श्रीरघुनाथ। लंकानाथ दंडावया ॥४५॥ अति लाघवी रघुनंदन। कैसें कैसें केलें रणविंदान। भ्रमचक्रीं पडे रावण। तैसे बाण सोडिले ॥४६॥

बाणाच्या पिसाऱ्याने रावणास रथासह उडविला: बाणपिसारियाचा पवन। सरथ उडविला रावण। वाहटुळीमाजीं भ्रमे पान। तेंवी भ्रमण लंकेशा ॥४७॥ बाणपिसारियाचा वारा। रावण उडविला अंबरा। परिभ्रमे गरगरां। रथीं थरथरां कांपत ॥४८॥ श्रीरामयुद्धाची कडाडी। रावण पाडिली रणझांपडी। अतिशयेंसी हडबडी[5]। रणनिर्वडी[6] विसरला ॥४९॥ बाप लाघवी रघुनाथ। अश्व सारथी ध्वजेंसीं रथ। बाणीं छेदिला आकाशांत। छत्रपात सचक्र ॥१५०॥

रावणाच्या रथाच्या घोड्यांचा व सारथ्याचा वध: तयाचि लाघवामाझारीं। चाप छेदोनि वरच्यावरी। मुकुट छेदोनियां शिरीं। धरेवरी पाडिला ॥५१॥ छेदोनि पाडितांचि रथ। पालथा मुखीं लंकानाथ। धरेवरी आदळत। पर्वतपात जेवी होय ॥५२॥

> तं विज्वलंतं तु समीक्ष्य रामः समाददे दीप्तमथार्धचंद्रम्।
> तेनार्कवर्णं सहसा किरीटं चिच्छेद रक्षोधिपतेर्महात्मा ॥३६॥
> तन्निर्विषाशीविषसन्निकाशं शांतार्चिषं सूर्यमिव प्रकाशम्।
> गतश्रियं कृत्तकिरीटकुंडलं प्रोवाच रामो युधि राक्षसेंद्रम् ॥३७॥
> कृतं त्वया कर्म महत्सुतीव्रं हतप्रवीरश्च कृतस्त्वयाहम्।
> तस्मात्परिश्रांत इति व्यवस्य न त्वां शरैर्मृत्युवशं नयामि ॥३८॥

रावणाच्या मुकुटाचा छेद व त्याचे भूमीवर पतन: बाणार्धशंद्रकडकडाट। सकुंडल छेदिला मुकुट। रणी गांजिला दशकंठ। वीर वरिष्ठ श्रीराम ॥५३॥ दांत पाडिलिया देख। जैसें सर्पाचें शमे विख। तेंवी संग्रामीं दशमुख। बळें निःशेष सांडवला ॥५४॥ जेवी शांत होय हुताशन[7]। सूर्यासी गिळी अभ्रघन[8]। तेंवी संग्रामीं दशानन। हन दीन आभासे ॥५५॥ मुकुट कुंडले छेदिलीं शिर्सीं। विरथ रावण मोकळे केशीं। संमुख देखोनि श्रीरामासी। कासाविसी होतसें ॥५६॥ बाणपिसारियाचा वारा। सरथ उडविला अंबरा। त्यासी भिडावया श्रीरामचंद्रा। न धरवे धीर लंकेशा ॥५७॥ करितां श्रीरामासीं रण। माझी न पुरे आंगवण। आता त्याचे सुटल्या बाण। अवश्य प्राण घेतील ॥५८॥ रणीं सहाय यावा दुसरा। तंव कपिपुच्छें निशाचरां। थोर लाविला भेदरा[9]। मुख्य धुरा घोळसूनी ॥५९॥ हनुमान होवोनि श्रीरामरथ। पुच्छें राक्षसां करी आघात। जो तो दडे जेथींचा तेथ। लंकानाथ कोण पाहे ॥१६०॥ कपिपुच्छें राक्षसश्रेणी। त्रासियेल्या रणांगणीं। रावणा साह्य न ये कोणी। तोही रणीं धांकत ॥६१॥ कपिपुच्छें राक्षसभार। रणीं गांजिले निशाचर। रामें गांजिला दशशिर। दुर्धर शर वर्षोनी ॥६२॥

रावणाला श्रीराम केविलवाण्या स्थितीमुळे विश्रांतीसाठी सोडतात: छत्रपात शस्त्रपात। रथपातेंसी कळापात। दीन देखोनि लंकानाथ। आश्वासित श्रीराम ॥६३॥ सावध ऐकें

शब्दार्थ : १. पुष्पमाला. २. वानराला. ३. जर्जर करीत, ४. रक्ताने माखलेला, ५. घाबरला, ६. युद्धकार्यकौशल्य, ७. अग्नी, ८. ढग, ९. भय, धाक.

दशानना। तुज म्यां दिधलें जीवदाना। आजि मी न घें तुझ्या प्राणा। जाय परतोन लंकेसी॥१६४॥ तुझे पुत्र आणि प्रधान । वानर म्हणती हीन दीन। तिहीं तुजसीं केलें रण। आंगवण जंव पुरे॥६५॥ वानरांसी करितां रण। भागलासी संपूर्ण। माझे साहतां दुर्धर बाण। अति क्षीण जालासी॥६६॥ भंगल्याचा करितां घात। हा तंव नव्हे गा पुरुषार्थ। आजींचा चुकला आघात। लंकेआंत जाय वेगीं॥६७॥ जावोनि भगिनी निजकलत्र। संबोखी पुत्र पौत्र। सुखें सुहृद स्वगौत्र। पाहें समग्र लंकेशा॥६८॥ माझ्या बाणाचा बाणावर्त। तो तुज रावणा प्राणांत। एक वेळां जावोनि लंकेआंत। भोगीं मुख्यार्थ प्रिय कांता॥६९॥

स एवमुक्तो हतमानदर्पो निकृत्तचापः स हताश्वसूतः।
अन्यं रथं सारथिना प्रणीतं समारुरोहाथ विवृद्धलज्जः॥३९॥
शोकार्दितः कृतमहाकिरीटो विवेश लंकां सहसा गतश्रीः।
तस्मिन्प्रविष्टे रजनीचरेंद्रे महाबले दानवदेवशत्रौ॥४०॥
हरीन्विशल्यान्सह लक्ष्मणेन चकार रामः परमाहवाग्रे॥४१॥

हीन, दीन स्थितीमध्ये रावणाचे लंकेस प्रयाण : तुज दिधलें जीवदान । ऐकोनि रामाचें वचन। रावण जाला हीन दीन। लज्जायमान रणरंगीं॥१७०॥ रावणाची गेली राजकळा। अंगीं बाणली अवकळा। शौर्यवीर्यधैर्यबळा। रामें नागविला रणरंगीं॥७१॥ रावणाचें ब्रीद गहन। आपणा म्हणवी अरिदर्पघ्न[1]। श्रीराम दर्पघ्ना दर्पघ्न। दशानन दंडूनी॥७२॥ रावणाच्या शरीरभारा। मुसमुसित गर्वफुगार । बाणपिसाऱ्याचा वारा। दशशिरा गर्वभंगा॥७३॥ रणीं क्षोभोनि रघुनाथ। रावणा केले हताहत। आणिक आणोनियां रथ। लंकेआंत प्रवेशे॥७४॥ निर्वाणशस्त्रें अति प्रबळ। शर चाप त्रिशूळ शूळ। परिघ पट्टिश शक्ति सबळ। केलें निर्मूळ श्रीरामें॥७५॥ मुकुट कुंडले नाहींत शिसीं। रथीं बैसला मोकळे केशीं। परम लज्जा रावणासीं। स्वयें लंकेसीं प्रवेशला॥७६॥ रावण जाता पैं लंकेसीं। मुखीं उरल्या मसी। मुख न दाखवी कोणासी। अधोमुखेंसीं[2] निघाला॥७७॥ युद्धी अपजयो राक्षसेंद्रा। तेणें रुदन दशशिरा। नयनीं स्रवती अश्रुधारा। लंकापुरा प्रवेशे॥७८॥

श्रीराम स्वतःच्या शिबिरात येतात : स्वयें येवोनि रघुपती। लक्ष्मणासीं भेदली शक्ती। आलिंगून अति प्रीतीं। निःशल्य करिती सौमित्रा॥७९॥ माझे सखे जुत्पती। घायवट[3] रणीं पडती। त्यांसी द्याया सुखविश्रांती। स्वयें रघुपति रणा पाहे॥१८०॥ घायवट पडतां कपिभुज। लाविती श्रीरामचरणरज। तेणें जावोनि दुःखसमाज। नाचती भोजें रणरंगीं॥८१॥ वानरवीर रणांगणी। रणीं पडला नाहीं कोणी। रामनामाच्या स्मरणीं। उल्हासोनी गर्जत॥८२॥ रणीं भंगला दशशिर। विजयी जाला श्रीरामचंद्र। वानर करिती जयजयकार। नामें कपींद्र गर्जती॥८३॥ लागली विजयवाद्यांची ध्वनी । घाव घातला निशाणीं। मंगळ तुरें मंगळ ध्वनीं। कपिये रणीं नाचती॥८४॥ वानरां हर्ष अपार। अवघे करिती जयजयकार। नामें गर्जत अंबर। श्रीरामचंद्र निजविजयी॥८५॥ एका जनार्दना शरण। रणीं भंगला रावण। नित्यविजयी रघुनंदन। बिभीषण आल्हादी॥८६॥ बिभीषणाचे मनोरथ। पुरवावयालागीं रघुनाथ। रणीं दंडिला लंकानाथ। विजयान्वित श्रीराम॥१८७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणपराजयो नाम एकोनविंशतितमोऽध्यायः॥१९॥ ओंव्या॥१८७॥ श्लोक॥४१॥ एवं॥२२८॥

शब्दार्थ : १. शत्रूचा गर्व हरण करणारा, २. खाली तोंड घालून, ३. जखमी.

# अध्याय विसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## कुंभकर्णाला जागृत करतात

दुःखित मनःस्थितीमध्ये रावणाचे आगमन : श्रीरामासीं करितां रण। रणीं भंगला रावण। लज्जायमान अति उद्विग्न। आला आपण लंकेसीं ॥ १ ॥

स प्रविश्य पुरीं लंकां रामबाणभयार्दितः। भग्नदर्पस्तदा राजा बभूव व्यथितेंद्रियः ॥१॥
मातंग इव सिंहेन गरुडेनेव पन्नगः। अभिभूतोऽभवद्राजा राघवेण महात्मना ॥२॥
ब्रह्मदंडप्रतीकानां विद्युत्सदृशवर्चसाम्। स्मरन्राघवबाणानां विव्यथे राक्षसेश्वरः ॥३॥

हीन दीन लज्जायमान। राजा प्रवेशे लंकाभुवन। आठवितां श्रीरामबाण। धाकेंचि प्राण निघों पाहे ॥ २ ॥ जैसा विजेचा लखलखाट। तैसा बाणांचा कडकडाट। श्रीरामबाणें दशकंठ। धाकें यथेष्ट धाकत ॥ ३ ॥ ब्रह्मदंडा न चले निवारण। तैसे अनिवार श्रीरामबाण। तिहीं बाणीं त्रासिला रावण। आक्रंदे पूर्ण अति धाकें ॥ ४ ॥ सिंह मदगजा खंदळी[1]। गरुड सर्पा करी चिरफळी। तेंवी श्रीरामबाणजाळीं। त्रासें तळमळी लंकेश ॥ ५ ॥ वीर्य शौर्य रणसाटोप। रावणाअंगी खटाटोप। देखोनि श्रीरामप्रताप। भग्नदर्प[2] लंकेश ॥ ६ ॥ रणीं भेदरला[3] रावण रातीं वोसणाये[4] आपण। आले आले श्रीरामबाण। माझा प्राण घ्यावया ॥ ७ ॥ जागृत स्वप्न सुषुप्ति अवस्थां। श्रीरामभय लंकानाथा। आणीक कांहीं नाठवे चित्ता। भयार्तता संत्रस्त[5] ॥ ८ ॥ सुख नाहीं सुमनसेजेसीं[6]। सुख नाहीं स्त्रीभोगापासीं। श्रीरामभय रावणासीं। अहर्निशीं[7] संतप्त ॥ ९ ॥

स कांचनमयं दिव्यमाश्रित्य परमासनम्। अवेक्षमाणः सचिवान्रावणो वाक्यमब्रवीत् ॥४॥
सर्वं तत्खलु मोघं मे यत्तप्तं परमं तपः। इंद्रेण यः समानोऽहं मानुषेण पराजितः ॥५॥
देवदानवगंधर्वैर्यक्षराक्षसपन्नगैः। अवध्यत्वं मया प्राप्तं परिभूतास्तु मानुषाः ॥६॥
सत्यं बिभीषणेनोक्तं यत्तद्वाक्यं महात्मना। मया दर्पबलोत्सेकादन्यथा चिंतितं तदा ॥७॥
तदिदं मामनुप्राप्तं बिभीषणवचः शुभम्। तस्य प्रत्युतवाक्यस्य नान्यथा जातु सांप्रतम् ॥८॥

रावणाची लज्जास्पद स्थिती : रावण लज्जान्वित मनीं। बैसला हेमसिंहासनीं। ज्या सिंहसनाच्या महिमानीं। येती लोटांगणीं सुरवर ॥ १० ॥ ते आसनमहिमा समस्त। रामें केली हताहत। ते आसनीं लंकानाथ। अति सचिंत अनुतापी ॥ ११ ॥ इंद्रादिक सुरगण। नित्य माझे बंदीजन[8]। श्रीरामें त्या मज करितां रण। तृणासमान मज केलें ॥ १२ ॥ माझी पाहतां आंगवण। चळीं कांपती सुरगण। त्या मज मनुष्या[illegible]ें करितां रण। तृणासमान मज केलें ॥ १३ ॥ इंद्रादिक सुरगण। निवातकवच दैत्य गण। दानव मानव करितां रण। अवध्य रावण मी सर्वथा ॥ १४ ॥ यक्ष गंधर्व विद्याधर। किंपुरुषादि पन्नग विखार[9]। त्यांसी युद्ध करितां घोरांदर। दशशिर अवध्य ॥ १५ ॥ ऐसा अवध्य मी रावण। श्रीरामेंसीं करितां रण। मज केले फल्गुसमान[10]। घेईल प्राण बाणें एकें ॥ १६ ॥ मज देवोनि जीवदान। रामें सोडिलें आपण। तो मज जरी विंधिता बाण। जाता प्राण निमेषार्धे ॥ १७ ॥ सत्य बोलिला बिभीषण। राम बाणें घेईल प्राण। ते मज प्रतीति[11] आली पूर्ण। करितां रण रामासीं ॥ १८ ॥ बिभीषणहितवाक्यार्थ[12]।

**शब्दार्थ :** १. नाश करी, २. गर्वरहित, ३. भ्याला, ४. झोपेत बडबडू लागला. ५. त्रासलेला, ६. पुष्पशय्येवर, ७. रात्रंदिवस, ८. स्तुतिपाठक, ९. विषमय, १०. कस्पटासमान, ११. अनुभव, १२. बिभीषणाचे हितकारक भाषण.

तें मी न मानींच गर्वोन्मत्त। तें मज आतां जालें प्राप्त। रण प्राणांत श्रीरामें॥१९॥ माझा बिभीषण येथें असता। तरी तो चुकविता आघाता। काय म्यां करावें आतां। परम चिंता मज वाटे॥२०॥ चिंतेनें होतां अति उद्विग्न। आठवला कुंभकर्ण। त्यासी उठवावया रावण। धाडी आपण प्रधानसैन्या॥२१॥

स चाप्रतिमगांभीर्यो देवदानदर्पहा। ब्रह्मशापाभिभूतस्तु कुम्भकर्णो विबोध्यताम्॥९॥
समरे जितमात्मानं प्रहस्तं च हतं रणे। ज्ञात्वा रक्षोबलं भीममादिदेश महाबल:॥१०॥
निद्रावेशसमाविष्ट: कुंभकर्णो विबोध्यताम्। स हि संख्ये महाबाहु: ककुदं सर्वरक्षसाम्॥११॥
वानरान्राजपुत्रौ च क्षिप्रमेव हनिष्यति। नवसप्तदशाष्टौ च मासान्स्वीपीत राक्षस:॥१२॥
विबोधयित्वा तं क्षिप्रं कुंभकर्णं महाबलम्। भविष्यति न मे शोक: कुंभकर्णे विबोधिते॥१३॥

रावणास कुंभकर्णाची आठवण होते : कुंभकर्ण आर्तुबळी[1]। शीघ्र उठवा रे ये काळीं। राक्षस मारिले महाबळी। रणकल्लोळीं वानरीं॥२२॥ वानरीं करून कंदन। विरूपाक्ष अकंपन। प्रहस्त मारिला प्रधान। जो जीवप्राण लंकेशा॥२३॥ श्रीरामासीं रावण। संमुख साटोपें करितां रण। घायें केला तृणासमान। हीन दीन मशकत्वें॥२४॥ ऐसें सांगोनि निर्वाण[2]। शीघ्र उठवा कुंभकर्ण। तो मारून राम लक्ष्मण। आमचे प्राण राखील॥२५॥ कुंभकर्ण बळिया बळी। भिडतभिडतां रण कल्लोळीं। राम सौमित्र सगळे गिळी। करील होळी वानरां॥२६॥ कुंभकर्णाची रणव्युत्पत्ती। आम्हां आहे परम विश्रांती। तो उठवावा शीघ्रगती। लंकापति सांगत॥२७॥ निवारावया वानरविघ्न। प्रबोधावया[3] कुंभकर्ण। सैन्य सेनानी[4] प्रधान। शीघ्र रावण पाठवी॥२८॥ ब्रह्मशापाची संपूर्ण। कुंभकर्णा निद्रा दारुण। त्यासी प्रबोधावया रावण। धाडी आपण प्रधानसेना॥२९॥ प्रथमप्रबोध सात मास। कदाचित लागती आठ मास। केव्हां केव्हां नवमास। एक वेळ दशमास लोटले॥३०॥ उरीं आदळलें मरण। अद्यापि सुखनिद्रा कोण। शीघ्र उठवा कुंभकर्ण। स्वयें रावण गर्जत॥३१॥ शक्रशिवतुल्य[5] बळ यासीं। उपयोगा न ये गा या समयासीं। व्यर्थ पोषिलें मांसराशीं। रावण आवेशीं गर्जत॥३२॥

तेऽपि तद्वचनं श्रुत्वा राक्षसेंद्रस्य राक्षसा:। जग्मु: परमसंभ्रांता: कुंभकर्णनिवेशनम्॥१४॥
तस्य नि:श्वासवातेन कुंभकर्णस्य राक्षसा:। बलवंतोऽपि पुरत: स्थातुं नाशन्कुवंस्तदा॥१५॥
कुंभकर्णस्य नि:श्वासैरवधूता महाबला:। अतिप्रमाणा: कृच्छ्रेण यत्नाप्रविविशुर्गृहान्॥१६॥
ऊर्ध्वरोमांचिततनुं श्वसंतामिव पन्नगम्। ददृशुनैर्ऋतव्याघ्रा: शयानं भीमविक्रमम्॥१७॥
भीमप्राणबलं भीमं पातालविपुलाननम्॥१८॥

कुंभकर्णाला निद्रेमधून उठविण्याची आज्ञा : ऐकोनि रावणांचें उत्तर। प्रधान सेनानी निशाचर। प्रबोधावया कुंभकर्ण वीर। अवघे सत्वर निघाले॥३३॥ अश्वसंभार गजघट[6]। रथ चालिले घडघडाट। प्रबोधावया कुंभकर्ण स्पष्ट। वीर वरिष्ठ चालिले॥३४॥ कुंभकर्णगृहाआंत। रिघतां राक्षस समस्त। अवघे चळचळां कांपत। जीवीं धुकधुक धाकती॥३५॥ पाताळतळविवरदरा। तैसें वदन निशाचरा। काळें करूं शके अंधारा। तैसी शरीरा कालिमा॥३६॥

कुंभकर्णाची निद्रितावस्था : काळें करूं शके काजळा। ऐसा सबाह्य निखळ[7] काळा। ना तो कोळशियाचा घडला पुतळा। किंवा ओतिला मोढ्याचा॥३७॥ राक्षस येतां द्वारप्रती।

शब्दार्थ : १. पराक्रमी, २. निकराचा प्रसंग, ३. जागा करण्याकरिता, ४. सेनापती, ५. इंद्र, शंकर यांसमान, ६. हत्तींचा समुदाय. ७. अगदीं, निव्वळ.

शतानुशत श्वासानुवर्ती। आवर्ती पडले हस्ती। येती जाती निःश्वासीं ॥३८॥ नासिकरंध्रामाझारीं। अडकलीं आरडती कर्‍हीं[1]। म्हैसे गुंतले त्यामाझारी। निर्गम[2] बाहेरी पुरेना॥३९॥ निःश्वासाचा तीव्र वारा। अश्वपदातिरथकुंजरां। वेगें उडविले अंबरा। भोंवती गरगरां आकाशीं॥ ४०॥ राहतां त्याच्या मुखासंमुख। जो तो पावे असुख[3]। अवघे जाले पराङ्मुख। प्रबोधीं दुःख राक्षसां॥ ४१॥ राक्षसीं करोनि अति यत्न। चुकवोनि त्याचें श्वासावर्तन[4]। प्रयासें प्रवेशले भवन। प्रबोधन करावया॥४२॥ तिखट शस्त्रें तेजाळीं। तैशा ऊर्ध्व रोमावळी। हात लावितां सर्वांगफळीं। कोणी जवळीं येऊं न शके॥४३॥ भयानक प्राणपरिचार। भयानक शरीरभार। भयानक मुख अत्युग्र। भासे क्रूर सर्वांसी॥४४॥ कुंभकर्णाची क्षुधा दारुण। सिद्ध भक्ष्य नसतां जाण। भक्षील अवघे लंकाभुवन। यालागीं भक्षण रावण धाडी ॥४५॥

तत्रोपजहः क्षिप्रं ते कुंभकर्णाग्रतस्तदा। भूतानां मेरुसंकाशं राशिं परमतर्पणम्॥१९॥
मृगाणां महिषाणां च वराहाणां च संचयान्। चक्रुर्नैऋतशार्दूला राशिमन्नस्य चाद्भुतम्॥२०॥
ततः शोणितकुंभांश्च मांसानि विविधानि च। पुरस्तात्कुंभकर्णस्य चक्रुस्त्रिदशशत्रवः॥ २१॥
गंधं माल्यं तथा पानं भक्ष्यं चादाय सत्वरम् । आसाद्य भवनं तस्य विविशुस्ते नृपाज्ञया॥२२॥

कुंभकर्णाला जागृत करण्यासाठी रावणाची योजना : पक्वान्नांचे डोंगर। अन्नांचे गिरिवर। स्वयं रिचवी दशशिर। क्षुधा दुर्धर कुंभकर्णा।॥४६॥ अन्नें तृप्ति नव्हे कुंभकर्णासीं। मृग वराह मेंढे महिषांसी। रावण धाडी भक्षावयासी। बहु कळपांसी असंख्य॥४७॥ मद्याचे कोटिकोटि घट। तैसेचि अशुद्धाचे[5] लोट। शीघ्र धाडी दशकंठ। कुंभकर्णाचे तृप्तिलागीं॥४८॥ कुंभकर्णासी समाधान। द्यावयालागीं दशानन। तांबूलादि सुमनचंदन[6]। धाडी आपण सुखार्थ॥ ४९॥ भक्ष्य भोज्य अन्नपान । घेवोनियां प्रधान। प्रवेशले कुंभकर्णभवन। कंपायमान अति धाकें॥ ५०॥

कुंभकर्णं महानिद्रं बोधनाय प्रचक्रिरे। जलदा इव उन्नेदुर्यातुधानास्ततस्ततः॥२३॥
बिभीदुश्चास्य गात्राणि घ्नंतोऽतिव्यनदंस्तथा। कुंभकर्णविबोधार्थं चक्रुस्ते विपुलं स्वनम्॥२४॥
उष्ट्रान्खरान्हयान्नागान्जघ्नुर्दंडकशांकुशैः। भेरीशंखमृदंगांश्च सर्वप्राणैरवादयन्॥२५॥
निजघ्नुश्चास्य गात्राणि महाकाष्ठकटंकरैः। मुद्गरैर्मुशलैश्चैव सर्वप्राणसमुद्यतैः॥२६॥

कुंभकर्णाला उठविण्याचा प्रयत्न : कुंभकर्णनिद्रा घोरांदर। त्यासी बोधावया[7] निशाचर। मेघ गडगडे ऐसा गिरागजर। करिती समग्र महानदीं॥५१॥ टाळ घोळ मृदंग भेरी। गिडबिडीं वाजती अति गजरीं। शंख वाहिले निशाचरीं। दिधल्या असुरीं आरोळ्या।॥५२॥ अंकुशें गज किरकिरती। दंडें उष्ट्र[8] आरडती। दीर्घ स्वरें खर[9] भुंकती। अश्व हिंसती समकाळें॥५३॥ अश्व गज खर उष्ट्र। हाक देतां निशाचर। कुंभकर्णनिद्रा आसुर। प्रबोधपर[10] तो नव्हे॥५४॥ असुर खळबळले अत्यंत। काष्ठ तरटें टोणपेघात। एक मुसळ वरी घालित। एक हाणित गदाप्रहारें॥५५॥ एक हाणिती गुडघे कोंपर। एक लाताविती[11] त्याचें शरीर। एक ते हाणिती मुद्गर। एक ते दुर्धर देती बुक्या॥५६॥ एक त्यावरी अति तांतडीं। सर्वशक्तीं घालिती उडी। एक काष्ठें घालोनियां बुडीं। आपल्या प्रौढीं उचलिती॥५७॥

ततः सहस्रं भेरीणां युगपत्समहन्यत। तद्रक्षो बोधयिष्यंतश्चक्रुरन्ये पराक्रमान्॥२७॥
केशान्प्रलुलुपुश्चान्ये कर्णानन्ये दशंति च। अन्ये च बलिनस्तस्य कूटमुद्गरपाणयः॥२८॥

शब्दार्थ : १. उंटे, २. सुटका, ३. दुःख, ४. श्वासोच्छ्वास, ५. रक्ताचे, ६. फुले आणि चंदन, ७. जागा करण्याकरिता, ८. उंटे, ९. गाढव, १०. जागा, ११. लाथा मारू लागले.

मूर्ध्नि वक्षसि गात्रेषु निर्दयं समपातयन्। दशराक्षससाहस्त्रं जघ्नभीमपराक्रमा :॥२९॥
राक्षसानां सहस्त्रं तु शरीरेऽस्य प्रधावति। कुंभकर्णस्तदा सुप्तो नैव संप्रत्यबुध्यत॥३०॥
ततो गजसहस्त्रं तु शरीरे संप्रधावति। स हन्यमानोऽपि तदा न चावुध्यत राक्षसः॥३१॥

**कुंभकर्णाला जागृत करण्याचा राक्षसांचा प्रयत्न :** सहस्रभेरीनादकल्लोळ। त्राहाटिल्या[१] समकाळ[२]। ब्रह्मशापें निद्रा प्रबळ। नव्हे अळुमाळ[३] प्रबोध[४]॥५८॥ प्रबोध न पवे कुंभकर्ण। तेणें क्षोभोनि राक्षसगण। दीर्घ मुद्गर घेवोनि जाण॥ घाय दारुण हाणिती ॥५९॥ उरीं शिरीं सर्व गात्रीं। घाय हाणिजेती निशाचरीं। कुंभकर्णा निद्रा भारी। प्रबोध न धरी आघातें॥६०॥ पिसा वळवळती अंथरूणीं। तैसीं राक्षसांचीं मारणीं। कुंभकर्ण तें कांहीं न मानी। सुखशयनीं सुषुप्ती॥६१॥ एक झोंटी धरोनि आंसुडिती। एक केशांतें ओढिती। एक रागें कानीं डसती। तरी सुषुप्ती भंगेना॥६२॥ दहा सहस्र वीर विख्यात। विक्रमें शरीर लोटित। तेणें कुंभकर्णा ऐसें होत। पोटकुल्या होत सुखनिद्रा॥६३॥ रावणा सांगती निशाचर। प्रयत्न करितां घोरांदर। जागा न होय कुंभकर्ण वीर। तेणें दशशिर क्षोभला॥६४॥ शरीर दडपितां संभार। जागा होईल कुंभकर्ण वीर। गज दिधले सहस्रें सहस्र। शरीरभारें दडपावया॥६५॥ निद्राप्रबोधनीं अति चतुर। भरंवसियाचे सहस्र वीर। रावणें धाडिले प्रबोधकर। देहीं निरंतर धांवावया॥६६॥ देहीं निरंतर धांवतां। प्रबोध न होय कुंभकेता। या काकुलती लंकानाथा। होय धाडिता गजांसी॥६७॥ कुंजर आणि निशाचर। धांवतां कुंभकर्णशरीर। तेथें जालें चरित्र। अति विचित्र तें ऐका॥६८॥ कुंभकर्णरोमावळीआंत[५]। गज हरपले महावतांसहित। उदय अस्त न कळे तेथं। परिभ्रमत घोर वनीं॥६९॥ पुढिलां मागील न देखती। मागिलां पुढील न दिसती। रोमांमाजी अति भ्रांतीं। परिभ्रमती अवासवा॥७०॥ पुढें मार्ग न दिसे स्पष्ट। मार्ग परतावया न कळे वाट। महावतेंसीं गजघट। पावती कष्ट चालतां॥७१॥ गज निर्बुजले किरकिरती। महावतें हाका देती। धांवण्या कोणी तेथें न पवती। परिभ्रमती अति दुःखी॥७२॥ न धरत न सांवरत। बुडाले नाभीं महागर्त। गज पडिले असंख्यात। त्यांसी प्राणांत तेथेंचि॥७३॥ गज चालतां अंगावरी। म्हणती मर्दन अति चतुरी। निदसुरिया हाणितां तोंडावरी। महामारी असंख्य॥७४॥ गजसैन्य देतां हाक। परतावया न सरे मुख। निर्बुजोनि[६] एकाएक। गज निःशेख निमाले॥७५॥ कुंभकर्णाच्या अंगावरी। असंख्य गजां जाली बोहरी[७]। तरी जागा नव्हे विवरीं। निशाचरीं आकांत॥७६॥ सहस्र वीर बळेंकरीं। वळंघले त्याच्या अंगावरी। अवघे येतां उरावरी। लोमांमाझारी अडकले॥७७॥ पूर्व पश्चिम ते कोण। न कळे उत्तर दक्षिण। पुढारां केउतें[८] गमन। पुनरागमन लक्षेना॥७८॥ सैरा धांवती निशाचरी। पडिले दोहीं काखेमाझारी। कांखवळा पैं भीतरीं। राक्षसहारी निमाल्या॥७९॥ एक संमुख हृदयावरी। पडिले श्वासोच्छ्वासयंत्री। येत जात नासारंध्रीं[९]॥ वायुचक्रीं विगुंतले॥८०॥ ऐसे शिणतां राक्षसगण। जागा नव्हे कुंभकर्ण। मग उपाव मांडिला कोण। सूक्ष्म सान तो ऐका॥८१॥ कुंभकर्णप्रबोधार्थ। मांडिलें स्त्रियांचें अनुगीत। त्याही गीताचा वृत्तांत। सावचित्त अवधारा॥८२॥

प्रमदाश्चागतास्तत्र संमृष्टमणिकुंडलाः। नागराक्षसकन्याश्च तथा गंधर्वकन्यकाः॥३२॥
मनुजानां दुहितरः किन्नराणां तथैव च। प्रविष्टा भवनं रम्यं तप्तकांचनकुट्टिमम्॥३३॥
ता स्त्रियो गीतवादित्रैः कुंभकर्णाग्रतः स्थिताः। दिव्यादिव्यैरलंकारैर्दिव्यधूपेन धूपिताः॥३४॥

शब्दार्थ : १. वाजविल्या, २. एकाच वेळी, ३. किंचितही ४. जागृती, ५. कुंभकर्णाच्या केसांत, ६. घाबरून, ७. नाश, ८. कोठे, ९. नाकपुड्यांत.

कुंभकर्णाच्या जागृतीसाठी नागकन्या व गंधर्व कन्यांची योजना : कुंभकर्णप्रबोधना। करावया संगीतगायना। नागकन्या गंधर्वकन्या। राजकन्या आणविल्या॥८३॥ गावों जाणती नाना कुसरीं। किन्नरी आणि खेचरी। कुंभकर्णमंदिरामाझारी। त्वरेंकरीं आणविल्या॥८४॥ कन्या आणिल्या सालंकार। हेमभूमिका हेममंदिर। तेथें पहुडला निशाचर। घोर अंबर गर्जत॥८५॥ त्याच्या घोसपुढें स्त्रीगायन। होवोनि गेलें तृणासमान। तें देखोनि दशानन। उपाव आन आरंभी॥८६॥

रंभा, मेनका व उर्वशी यांचा प्रयत्न : घृताची रंभा मेनका। नारायणदत्त उर्वशी देखा। तिसीं मुख्यत्व देवोनि देखा। अष्टनायिका आणिल्या॥८७॥ त्यांसी सांगे दशानन। तुम्हीं प्रबोधावा कुंभकर्ण। नाहीं तरी नाक कान छेदीन। त्यावरी दंडीन खरारोहीं[1]॥८८॥ ऐकोनि रावणाचें वचन।अप्सरा जाल्या कंपायमान। कुंभकर्णाचें भवन। गेल्या ठाकोन प्रबोधा॥८९॥ सज्जोनि वीणा श्रुतिसन्नद्ध। रागानुरागीं साधिला नाद। गातां विविध बोधप्रबंध। नव्हे प्रबोध कुंभकर्णा॥९०॥ कुंभकर्ण घोरे दारुण। त्यापुढें कळाविचित्र गायक। अवघें गेलें हारपोन। जेंवी भानूपुढें खद्योत[2]॥९१॥ सकळ कळा जाली क्षीण। प्रबोध न पवे कुंभकर्ण। तेणें घृताची रंभा मेनका जाण। अति उद्विग्न भयभीत॥९२॥ नुठवितां कुंभकर्ण। स्त्रीदेहासीं विटंबन। रावण छेदील नाक कान। खरारोहण अपमान॥९३॥ ऐसें देखोनियां विघ्न। उर्वशी जाली सावधान। निजात्ममूळ जो नारायण। त्याचे स्तवन आदरिलें॥९४॥ उर्वशी नारायणनिजशक्ती । कृपेनें धाडिली स्वर्गाप्रती। तीच नारायणाची स्तुती। अनुतापवृत्तीं अनुवादे॥९५॥ भूतीं भूतात्मा परात्पर। तुझिये सत्ता प्राणप्रचार[3]। निमेषोन्मेषांचा[4] व्यापार। तुझेनि साचार चालतो॥९६॥ भूतीं भूतात्मा तो वेदोक्त। भूतां सबाह्य तूं भगवंत। तुझेनि भूतें विधियुक्त। सदा वर्तत निजकर्मी॥९७॥ तूं मनाचें उन्मन। तूं बुद्धीचें समाधिधन। तूं अभिमानीं निरभिमान। चित्तास चिंतन तुझेनि॥९८॥ तूं प्राणाचा निज प्राण। तूं जीवाचा जीव आपण। प्रबोधावया कुंभकर्ण। कृपा संपूर्ण करावी॥९९॥ प्रबोधोनि कुंभकर्ण। निवारावे माझें विघ्न। ऐसें ऐकतां विज्ञापन। श्रीनारायण तुष्टला॥१००॥ अंतर्यामीं श्रीनारायण। ऐकतां उर्वशीगायन। चेतवी असुराचा प्राण। चेतना संपूर्ण चेतविली॥१॥ घोर गर्जत धांवे प्राण। तो अंतर्यामीं आंवरून। हृदयीं आणोनि आपण। दशधा संपूर्ण स्थापिला॥२॥ प्राणपरिचारप्रयुक्ती। चेतना जे चिच्छक्ती । तिणें चेतविल्या इंद्रियवृत्ती। देहस्फूर्ती आठवली॥३॥

गीतवादिवशब्देन खरेण मधुरेण च। दिव्येन चैव गांधर्वस्वरेण विविधेन च॥३५॥
विबुद्ध : कुंभकर्णोऽसौ भीमो भीमपराक्रमः। तस्य जाजृंभमाणस्य वक्त्रंपातालसन्निभम्॥३६॥
ददृशे मेरुश्रृंगाग्रे दिवाकर इवोदितः। राक्षसारत्वरितं जग्मुर्दशग्रीवनिवेशनम्॥३७॥
तेऽभिगम्य दशग्रीवमासीनं परमासने। ऊचुर्बद्धांजलिपुटाः सर्व एव निशाचराः॥३८॥
प्रबुद्धः कुंभकर्णो वै भ्राता ते राक्षसेश्वरः॥३९॥

कुंभकर्णाला जागृती : देहस्फूर्तीचेनि कैवाडें। उघडी नेत्रांची कवाडें। श्रवणाचें टाळें उघडे। वाचा निवाडें वदे स्पष्ट॥४॥ प्राण परिचारितां घ्राणीं। सावधानता सकळ करणीं। बुद्धी बोद्धव्य बोधुनी। संकल्प मनीं चेतविले॥५॥ एक निःशंक सुंदरा। चंदन चर्चिती निशाचरा। एक घालिती विंझणवारा। एकी राक्षसेंद्रा थापटिती॥६॥ गीतवाद्यस्वर सुस्वर। प्रमदागायन[5] अति मधुर। ऐकोनि उठिला निशाचर। अदि दुर्धर भयानक॥७॥ उग्र क्रूर

शब्दार्थ : १. गाढवावर बसवून, २. काजवे, ३. जीवांची हालचाल, ४. डोळ्यांचे मिटणे व उघडणे, ५.अप्सरांचे गायन.

भयानकदृष्टी। कळिकाळ चळीं कांपे पोटीं। प्रमदा पळाल्या उठाउठीं। सैन्य बारा वाटीं पळालें॥१८॥ जांभया देतां निशाचर। जैसें उघडलें पाताळविवर। तैसें मुख पसरिलें दुर्धर। अति उग्र भयानक॥१९॥ विजुतेजें अति कडाडी। जिव्हा लखलखित तांबडी। कराळ विक्राळ दाढांची जोडी। प्रळयाग्निपाडीं[1] सतेज दृष्टी॥११०॥ भयानक रूप भयानक दृष्टी। भयानक सर्वांगाची पुष्टी। परम भयानक उठिला सृष्टीं। कांपती पोटीं सुर सिद्ध॥११॥ प्रबोध झाला कुंभकर्णा। राक्षस सांगो येती रावणा। प्रवेशोनि लंकाभवना। सभास्थाना ते आले॥१२॥ सिंहासनीं दशानन। दूत घालिती लोटांगण। प्रबोध पावला कुंभकर्ण। कर जोडून सांगती॥१३॥ उर्वशीचा चमत्कार। वीणा सज्जोनि सुस्वर। प्रबोधिला निशाचर। महावीर कुंभकर्ण॥१४॥

**कुंभकर्णाला दूतांकरवी रावणाची आज्ञा :** रावण सांगें दूतांसी। परम क्षुधा कुंभकर्णासी। तृप्तिभोजन देवोनि त्यासी। मजपासीं मग आणावा॥१५॥ शीघ्र न पवे अन्नआहार। पुढें पाठविला फलाहार। मेष वराह जंबूक उष्ट्र। कळप अपार गीळित॥१६॥ मेंढरें घालितां मुखांत। कानावाटे निघती मेमत[2]। एक तीं गेलीं उशींत। तेणें शिंकत सटसटां॥१७॥ शेंबुडाच्या बेडक्यांत। राक्षस दडपती असंख्यात। रावणाचे सभेआंत। शेंबूडपर्वत वीरांवरी॥१८॥ कुंभकर्णाच्या शेंबुडात। सभा जाहली सचैल स्नात। तरी तो नव्हे तृप्त। मृगे भक्षित चितळेंसीं॥१९॥ कऱ्हीं[3] घशांत आरडत जात। वराह[4] गिळी ओरडत। रानम्हैसे घशांत जुंझत। थडके देत कळप गिळी॥१२०॥ हस्ती सांपडल्या हाताताळीं। ध्वंजा पताका महावतेंसीं[5] गिळी। रावण शंकला ते काळीं। करील होळी लंकेची॥२१॥

> द्रष्टुमिच्छति ते राजा सर्वराक्षसपुंगवः। कुंभकर्णः सुदुर्धर्षो भ्रातुराज्ञाय शासनम्॥४०॥
> तथेत्युक्त्वा महावीर्यः शयनादुत्पपात सः। प्रक्षाल्य वदनं हृष्टः स्नात : परमभूषणः॥ ४१॥

**कुंभकर्णाला दूतांचा संदेश :** दूरोनि सांगती दूत। लंकेश भेटीसीं वाट पहात। ज्येष्ठाज्ञा मानोनि समर्थ। उठिला त्वरित कुंभकर्ण॥२२॥ कुंभकर्ण सभे अत्युग्र। सर्वार्थी गमे क्रूर। भ्रातृआज्ञेचा किंकर। मानी उक्त सर्वस्वें॥२३॥ मुख प्रक्षाळितां तेथ। गुरळीसवें शतानुशत। राक्षस वाहों वाहून जात। चळीं कांपत सेवक॥२४॥ गुरळीच्या पुराआंत। तारूं घालोनि वीर काढित। अमित बुडाले जेथीचे तेथ। आणिले असंख्यात लावोनि कांसे॥२५॥

> पिपासुरत्वरयामास पानं मद्यसमान्वितम्। ततस्तु त्वरितास्तस्य राक्षसा रावणाज्ञाया॥४२॥
> मद्यं भक्ष्यांश्च विविधान्क्षिप्रमेवानयंस्तदा॥४३॥

**कुंभकर्णाची क्षुधाशांती :** पशु भक्षितां असंख्यात। कुंभकर्ण जाला तृषित। मद्याचे घट अमित। मुखीं रिचवित अति त्वरा॥२६॥ मुखीं रिचवितां[6] सहस्र घट। त्यांचा होय एक घोंट। कुंठ वाजे घडघडाट। हृदयस्फोट राक्षसां॥२७॥ ते संधी अति तांतडीं। असंख्य पक्वान्नपरवडी[7]। लागवेगें रावण धाडी। राक्षसकोडी धांवत॥२८॥ ओदनाचे[8] गिरिवर। शिड्या लावोनि निशाचर। स्वयें रिचविती पर्वताकार। तैसेच डोंगर पक्वान्नांचे॥२९॥ बाप कुंभकर्णाची थोरी। एकचि घांसे गटका करी। तृप्ति दिसेना पुढारीं। निशाचरीं आकांत॥१३०॥ तृप्ति न पुरे कुंभकर्णा। धाक राक्षसां आणि रावणा। बुद्धि आठवली दशानना। मांसभोजना उपपादी॥३१॥

> प्रहर्षणार्थं मनसो दीप्तास्यो रक्तलोचनः। आददे क्षुधितो मांसं शोणितं तृषितोपिबत्॥४४॥

---

शब्दार्थ : १. प्रलयाग्निसमान, २. मे मे शब्द करीत, ३. उंटे, ४. डुक्कर, ५. माहुतांसह, ६. ओतू लागले, ७. पक्वान्नांचे प्रकार, ८. भाताचे.

मेदः कुंभाश्च मद्यं च पपौ शक्ररिपुस्तदा । ततस्तृप्त इति ज्ञात्वा समुत्पेतुर्निशाचरा :॥४५॥
शिरोभिश्च प्रणम्यैनं सर्वतः पर्यवारयन् । किमर्थमहमादृत्य भवद्भिः प्रतिबोधितः॥४६॥
कच्चित्सुकुशलं राज्ञो भयं वा नेह किंचन॥४७॥

क्षुधेनें मुख अति विस्तीर्ण। आरक्त जिव्हा आरक्त नयन। तृप्ति न पवे कुंभकर्ण। धाडी रावण मांस आहार॥३२॥ मांसपाक अति चोखट। मैरेयक[१] मद्य[१] श्रेष्ठ। मद्याचे कोटिकोटि घट[२]। धाडी दशकंठ आहारार्थ॥३३॥ सुखी व्हावा कुंभकर्ण। उत्तम पदार्थ रावण। स्वयें धाडी साक्षेपून[३]। हर्ष संपूर्ण व्हावया॥३४॥ मांसमद्याचे पैं घट। कुंभकर्णे केले गट। तरी क्षुधेचा लवलवाट। चाटी घोट मटमटां॥३५॥ त्यासी सांगे स्वयें रावण। रणीं ठेसले[४] वानरगण। भक्षूनि श्रीरामलक्ष्मण। तृप्ति संपूर्ण पावसी॥३६॥ मैरेयकमद्यपान। साक्षेपें करवी रावण। तृप्ति पावोनियां पूर्ण। कुंभकर्ण डुल्लत॥३७॥ मैरेयकमद्यपानपरिपाठीं। कुंभकर्णा तुष्टिपुष्टी। हर्षे उचंबळला पोटीं। आनंद सृष्टी न समाये॥३८॥ तृप्ति पावोनि संपूर्ण। स्वस्थ बैसला कुंभकर्ण। तेव्हां सेवक प्रधान। करिती नमन साष्टांगें॥३९॥ पूर्वीं येतां क्षुधितापासीं। जें देखे त्यातें ग्रासी। स्वस्थ बैसल्या सावकाशीं। आला त्यापासीं परिवार॥१४०॥ सेवक देखोनि प्रधान। त्यांसी पुसें कुंभकर्ण। मज उठवावया काय कारण। स्वस्थ रावण आहे कीं॥४१॥ स्वस्थ लंकाराज्यानुबंधु। स्वस्थ माझे ज्येष्ठ बंधु। तरी कां केला मज प्रबोधु[५]। कार्यानुवादु मज सांगा॥४२॥

न ह्यल्पकारणे सुप्तं प्रबोधयति मादृशम्। तत्कथ्यतां यथार्थेन मम बोधनकारणम्॥४८॥
अथवा ध्रुवमन्येभ्यो भयं परमुपस्थितम्। यदर्थमव त्वरितैर्भवद्भिः प्रतिबोधित :॥४९॥
अद्य राक्षसराजस्य भयमुत्सादयाम्यहम्। पोथयिष्ये महेंद्र वा भक्षयिष्यामि वाऽनलम्॥५०॥

**क्षुल्लक कारणासाठी उठविल्याने कुंभकर्णाचा कोप:** अल्पकार्याकारणें। मज नुठविजे[६] रावणें। मज साक्षेपें[७] उठवणें। तो सांगणें कार्यार्थ॥४३॥ अतिशयेंसीं अति निर्वाण[८]। तुम्हांसीं आलें विघ्न दारुण। यालागीं माझें प्रबोधन । करवी रावण साक्षेपें॥४४॥ रावणाचे अरि वीर। इंद्र चंद्र वरुण कुबेर। त्यांचा करीन मी संहार। दशशिरसुखार्थ॥४५॥ रावणशत्रूची होळी। क्षणें करीन रणकल्लोळीं। तरीच मी आर्तुबळी। धुरेजवळी सुबंधु॥४६॥ रावणहिताच्या समेळीं। प्रळयानळ सगळा गिळीं। मर्दीन शत्रूची समफळी। तरीच मी सुबंधु॥४७॥

एवं ब्रुवाणं संरब्धं कुंभकर्णमरिंदमम् । यूपाक्षः सचिवो राज्ञः कृतांजलिरुवाच ह ॥५१॥
न नो देवकृतं किंचिद्भयमस्ति कदाचन। गंधर्वदानवेभ्यो वा भयमस्ति न नः क्वचित्॥५२॥
यादृशं मानुषाद्राज्ञो भयं घोरमुपस्थितम्। वानरैः पर्वताकारैर्लंकेयं परिवारिता॥५३॥
सीताहरणदुःखार्ताद्रामान्नः परमं भयम्॥५४॥

**यूपाक्ष प्रधान कुंभकर्णाला परिस्थिती सांगतो :** कोपला देखोनि कुंभकर्ण। यूपाक्ष तयाचा प्रधान। त्यासी विनवी कर जोडून। विघ्नचिन्ह सांगावया॥४८॥ देव दानव गंधर्व। गरुडादि पक्षी पन्नग[९] सर्व। यक्षरक्षादि स्वयमेव। त्यांपासाव भय आम्हां नाहीं॥१४९॥ घेवोनि वानराचे भार। मनुष्यावतारी श्रीरामचंद्र। तेणें क्षीण केला दशशिर। युद्धी दुर्धर[१०] गांजोनी॥१५०॥ राघवें विंधितांचि बाण। लंकेशाचा जावा प्राण। रामें देवोनि जीवदान । रणीं रावण सोडिला॥५१॥ रावणें केले सीताहरण। तेणें रागें रघुनंदन। दुर्धर सज्जूनियां बाण। त्याचा

शब्दार्थ : १. एक प्रकारची दारू, २. हांडे, ३. प्रयत्नाने, ४. जमले, भरले, ५. जागे करणे, ६. उठविणार नाही, ७. प्रयत्नाने, ८. संकटाचे, ९. सर्प, १०. अत्यंत.

प्राण घेऊं पाहे ।।५२।। तरी कृपाळु रघुनाथ। रावण सोडिला जीवें जीत। रणीं सांपडल्या लंकानाथ। न करीच घात श्रीराम ।।५३।। श्रीरामापरतें सर्वथा। भय नाहीं लंकानाथा। ऐसें कुंभकर्ण ऐकतां। सक्रोधता गर्जिन्नला ।।५४।।

स यूपाक्षवचः श्रुत्वा भ्रातुश्च भयामागतम्। कुंभकर्णो विवृत्ताक्षो यूपाक्षमिदमब्रवीत् ।।५५।।
सर्वमद्यैव यूपाक्ष हरिसैन्यं सलक्ष्मणम्। राघवं च रणे हत्वा पाश्चद्रक्ष्यामि रावणम् ।।५६।।
तस्याथ वाक्यं वदतो निशम्य सगर्वितं रोषविवृद्धघोरम्।
महोदरो राक्षसयोधमुख्यः कृतांजलिर्वाक्यमिदं बभाषे ।।५७।।
पश्चादपि महाबाहो शत्रून्युधि विजेष्यासि। त्वद्दर्शनपरं तावत् भ्रातरं द्रष्टुमर्हसि ।।५८।।
महोदरवचः श्रुत्वा राक्षसैः परिवारितः। कुंभकर्णो महातेजाः संप्रतस्थे महाबलः ।।५९।।

यूपाक्षाचे बोलणे ऐकून कुंभकर्णाचा क्रोध : ऐकोनि यूपाक्षवचन। श्रीरामयुद्धीं दुःखी रावण। ऐसें ऐकता[1] कुंभकर्ण। करावया रण खवळला ।।५५।। मारोनियां राम लक्ष्मण। निर्दाळूनियां वानरगण। मग मी येईन आपण। स्वयें रावण वंदावया ।।५६।। वानरांचें मांस शोणित[2]। तेणें राक्षस करोन तृप्त। रामलक्ष्मणांचें मांस रक्त। तें मी समस्त भक्षीन ।।५७।। रावणशत्रूसी मर्दून। रणीं करोनि दृढ बंधन। सुखी करोनि दशानन। मग मी येईन नमस्कारा ।।५८।। ऐकोनि कुंभकर्णगर्जन। महोदर मुख्य प्रधान। स्वयें बोलिला सुलक्षण[3]। कर जोडून तें ऐका ।।५९।। भेटीसीं उदित[4] दशानन। त्यासीं भेटोनि आपण। त्याचे घेवोनि आज्ञापन। रणकंदन करीं सुखें ।।१६०।। महोदराचें युक्त वचन। ऐकतां सुखी कुंभकर्ण। भेटावया दशानन। निघे आपण आल्हादें ।।६१।।

उदाराणां समद्यानां तदा राक्षसपुंगवः। पीत्वा घटसहस्रे द्वे तथा भुंक्त्वा च भोजनम् ।।६०।।
सज्जकर्णान्सजठरान्महिषान्शुलपैष्टकान्। अष्टो पशुशतान्येव पुरुषांश्चैकविंशतिः ।।६१।।
संभुज्य सुमहाकायो दावाग्निरिव कत्तृणम्। कुंभकर्णो महाबहुर्गमनायोपचक्रमे ।।६२।।
सरोषश्चोत्कटोमत्तस्तेजोबलसमन्वितः। सोऽगच्छद्भवनं राज्ञो रक्षोगणमसन्वितः ।।६३।।

भेटी जालिया रावण। अवश्य करणें पडेल रण। ऐसें जाणोनि कुंभकर्ण। प्राशी आपण महामद्य ।।६२।। सहस्रें सहस्र घटांच्या हारी। रिचविती[5] त्याच्या मुखामाझारीं। तैसींच लोणचीं कोशिंबिरी। भोजनोपचारीं महामद्य ।।६३।। सांडिया कुरवंडिया पापड। लाडू तिळव्याचे जोड। कुंभकर्णा भोजन गोड। पुरत कोड मद्येंसीं ।।६४।। आठ शत म्हैशियांच्या हारी। गिळिल्या कोशिंबिरीवारी[6]। एकवीस सहस्र पशु सोपचारीं। लोणच्यावारी भक्षिले ।।६५।। दावाग्नीमाजी पडे तृण। तें जेंवी जळे न लागतां क्षण। तेंवी जें जें भक्षी कुंभकर्ण। तें तें संपूर्ण करी भस्म ।।६६।। महाबाहु कुंभकर्ण। तृप्ति होवोनि संपूर्ण। भेटावया स्वयें रावण। निघे आपण अति गर्वे ।।६७।। मदोन्मत्त बळोन्मत्त गर्वोन्मत्त अति उन्मत्त। ऐसा राजगृहाआंत। प्रवेशत कुंभकर्ण ।।६८।। एका जनार्दना शरण। संमुख देखोनि रावण। स्वयें कुंभकर्णे आपण। लोटांगण घातलें ।।६९।। बंधुबंधूंची भेटी। दोघे सांगती गुह्य गोष्टी। ते ते कथेची कसवटी। सावध दृष्टीं अवधारा ।।१७०।। स्वस्ति श्रीभावार्थ रामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां कुंभकर्णप्रबोधनं नाम विंशतितमोऽध्यायः ।।२०।। ओंव्या ।।१७०।। श्लोक ।। ६३ ।। एवं ।।२३३।।

---

शब्दार्थ : १. क्रोधाने, २. रक्त, ३. योग्य, ४. तयार. ५. ओतितात, ६. कोशिंबिरीप्रमाणे.

# अध्याय एकविसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## रावण व कुंभकर्ण यांचा संवाद

भयानक कुंभकर्णाला पाहून वानर सैन्याची अस्वस्थता : प्रबोधोनि कुंभकर्णा। भेटों जातां पैं रावणा। भय उपजलें वानरगणा । त्याच्या उग्रपणा देखोनी ॥१॥

जगाम तत्रांजलिमालया वृतः शतक्रतुर्गेहमिव स्वयंभुवः।
तं मेरुशृंगप्रतिमं किरीटिनं स्पृशंतमादित्यमिवात्मतेजसा॥१॥
वनौकसः प्रेक्ष्य विवृद्धमद्भुतं भयार्दिता दुद्रुविरे समंततः।
केचिच्छरण्यं शरणं स्म रामं व्रजंति केचिद्व्यथिताः पतंति॥२॥
कैविद्दिशश्च त्वरिताः प्रयांति केचिद्भयार्ता भुवि शेरते स्म ॥३॥

मेघांचिया मेघमाळा। शोभती कुंभकर्णाच्या गळां। मुकुट टेंकला नभोमंडळा। तेजें रविकळा लोपती॥२॥ कराळ विक्राळ भयानक वदन। प्रळयतेजें अत्युग्र नयन। देखोनि त्याचें भ्यासुरपण[१]। वानरगण त्रासले॥३॥ उग्र देखोनि कुंभकर्ण। वानर श्रीरामा आले शरण। एक पडले मूर्च्छापन्न। एकांचे प्राण निर्बुजले[२]॥४॥ एकांची वळली बोबडी। एकां भरली[३] अरडीदरडी[३]। एक पडलीं उबंडीं[४]। तोंडे कोरडी एकांचीं॥५॥ एक वानर त्वरेंकरीं। गेलें समुद्रपरतीरीं । एक झालीं रानभरीं। एक धरेवरी लवंडली॥६॥ नावानिगे[५] जे जुत्पत्ती वानरवीर भद्रजाती। कुंभकर्णाच्या युद्धार्थी। आज्ञा पुसती श्रीरामा॥७॥

ततो रामो महातेजा धनुरादया वीर्यवान्। किरीटिनं महाकायं ददर्शातिभयंकरम्॥४॥
यं दृष्ट्वा विद्रुता दिग्भ्यो वानराणां महाचमूः। सुविस्मितभिदं रामो बिभीषणमुवाच ह॥५॥
कोयं पर्वतसंकाशः किरीटी हरिलोचनः। आचक्ष्व मे महान्कोऽसौ राक्षसो यदि वा सुरः॥६॥
न मयैवंविधं भूतं दृष्टपूर्वं कदाचन। संपृष्टो राजपुत्रेण रामेणाक्लिष्टकर्मणा॥७॥
बिभीषणो महाप्राज्ञः काकुत्स्थमिदमब्रवीत्॥८॥

बिभीषण रामांना कुंभकर्णाचे वर्णन सांगतो : दीर्घ मुकुट अति दारुण। भयानक कुंभकर्ण। श्रीरामें देखोनि आपण। धनुष्यीं बाण सज्जिले॥८॥ नाहीं पूर्वी ऐकिला। नाहीं पुराणीं परिसिला। अकस्मात दीर्घ दादुला। रामें देखिला एकाएकीं॥९॥ तेणें अतिशयें विस्मित। बिभीषणा पुसे श्रीरघुनाथ। अति दीर्घ लंकेआंत। कोण दिसतो विक्राळ॥१०॥ ज्याचे देखतां उग्रपण। पळाले माझे वानरगण। मुकुट कुंडले पिंगट नयन। सांग हा कोण मजपासीं॥११॥ ऐसें पुसतां रघुनाथ। बिभीषण बुद्धिमंत। कुंभकर्णाचा पूर्ववृत्तांत। असें सांगत श्रीरामा॥१२॥

सैष विश्रवसः पुत्रः कुंभकर्णो निशाचरः। एतेन जातमात्रेण क्षुधितेन महात्मना॥९॥
भक्षितानि सहस्राणि सत्वानि सुमहान्त्यपि। प्रजाभिः सह शक्रस्तुययौ स्थानं स्वयंभुवः॥१०॥
कुंभकर्णस्य दौरात्म्यं शशंसुस्ते प्रजापतेः। प्रजानां भक्षणं चैव शशंसुस्ते दिवौकसः॥११॥
एवं यदि प्रजा नित्यं भक्षयिष्यति राक्षसः। अचिरेणैव कालेन शून्यो लोको भविष्यति॥१२॥

तो हा विश्रव्याचा पुत्र जाण। नांवे विख्यात कुंभकर्ण। येणें उपजतांचि जाण। केलें भक्षण प्रजेचें॥१३॥ शतसहस्र भूतावळी। प्रजा भक्षिल्या जन्माळीं। तरी तृप्ति नव्हे आतुर्बळी। जिव्हा ळळळळी हळहळित॥१४॥ स्वर्गीचे भक्षी देवगण। मृत्युलोकींचे मानव

शब्दार्थ : १. भयंकरपणा, २. घाबरली, ३. सांदीकादीत पडलीं, ४. अव्यवस्थित, ५. प्रख्यात.

जाण। सर्व पक्षी सिद्ध चारण। भक्षी संपूर्ण जीवजात ॥१५॥ ऐसा देखोनि भूतावर्त[1]। प्रजा शक्रसमवेत। ब्रह्मयासीं गाऱ्हाणें देत। भूतें भक्षित कुंभकर्ण ॥१६॥ करावया भूतांचा घात। भला निर्मिला कुंभकर्ण नात। ब्रह्मसृष्टीचा क्षयार्थ। भोजनावर्त कुंभकर्ण ॥१७॥ कुंभकर्ण-भोजनासाठीं। त्रिसप्तरात्रीं शून्य सृष्टी। हा करील उठाउठीं। शक्र परमेष्ठी प्रार्थिला ॥१८॥ नित्य भक्षिता भूतानुकोटी। तृप्ति नव्हे याचे पोटीं। भूतशून्य करील सृष्टी। पोटासाठीं कुंभकर्ण ॥१९॥

वासवस्य वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः। रक्षः समाह्वयामास कंभकर्णं ददर्श च ॥१३॥
कुंभकर्णं समीक्ष्यैव विस्मितोऽभूत्प्रजापतिः। कुंभकर्णं महावीर्यं स्वयंभूरिदमब्रवीत् ॥१४॥
शयितो ह्येष षण्मासमेकाहं जागरिष्यति। असौ तु वीर एकान्हा क्षुधितो विचरन्भुवि ॥१५॥
आत्मना व्यसनेनाद्य कुंभकर्णो विबोधितः। त्वपराक्रमभीतश्च राजा संप्रति रावणः ॥१६॥

कुंभकर्णाच्या अधाशीपणाला निर्बंध म्हणून ब्रह्मदेवाचा शाप : ऐसी ऐकोनि इंद्राची गोष्टी। सादर जाला परमेष्ठी। कुंभकर्ण पहावया दृष्टीं। उठाउठीं आणविला ॥२०॥ कराळ विक्राळ दारुण। अति उग्र कुंभकर्ण। त्यातें देखोनि चतुरानन। विस्मयापन्न[2] स्वयें जाला ॥२१॥ पोटासाठीं भूतविघाती[3]। निर्माण केला हा पौलस्ती। कुंभकर्णासीं प्रजापती। शापोन्मुक्ती स्वयें वदला ॥२२॥ मृतकल्प अति असोस[4]। नित्य निद्रा तुज षण्मास। जागा होशी एक दिवस। त्यामाजी त्रास क्षुधेचा ॥२३॥ ब्रह्मशापें निद्रा पूर्ण। तो हा जाण कुंभकर्ण। तुजसीं करावया रण। स्वयें रावण उठविता झाला ॥२४॥ तुझेनि संग्रामें रावण। धाकेंचि सोडूं पाहे प्राण। म्हणोनि तुजसीं करावया रण। कुंभकर्ण उठविला ॥२५॥ त्यासीं देखताचि जाण। वानर पळती घेवोनि प्राण। त्यासीं संमुख करावया रण। नाहीं आंगवण[5] कपींसीं ॥२६॥ इंद्र चंद्र कुबेर वरुण। विद्याधर सिद्ध चारण। कुंभकर्णे करोनि रण। रणीं सुरगण जिंकिले ॥२७॥ दैत्य दुर्धर दानव। यक्ष राक्षस गणगंधर्व। पाताळपन्नग मानव। येणें सर्व जिंतिलें ॥२८॥ या कुंभकर्णाची पाठी। कोणी देखिली नाहीं सृष्टी। देव दैत्य दानवकोटी। येणें रणसंकटी गांजिले ॥२९॥ ऐसा दुर्धर कुंभकर्ण। क्षुधेनें पीडिला दारुण। भक्षावया वानरगण। येईल आपण आक्रोशें ॥३०॥

स एष क्षुधितो वीरो निर्गतः शिबिरात्खलु। वानरान्भृशसंक्रुद्धो भक्षयिष्यति वीर्यवान् ॥१७॥
विभीषणवचः श्रुत्वा हेतुमत्सुमुखोद्गतम्। उवाच राघवो वाक्यं नीलं सेनापतिं तदा ॥१८॥
गच्छ सैन्यानि सर्वाणि व्यूह्य तिष्ठस्व पावके। द्वाराणि संक्रमांश्चैव लंकाया यूथपैः सह ॥१९॥
राघवेण समादिष्टो नीलो हरिचमूपतिः। शशास वानरानीकं यथावत्कपिकुंजरः ॥२०॥

लंकेचे निरोधन : साक्षेपें सांगे बिभीषण। अति खादाड कुंभकर्ण। भक्षावया वानरगण। येईल आपण संग्रामा ॥३१॥ ऐकोनि बिभीषणवचन। हासिन्नला रघुनंदन। मी असतां कुंभकर्ण। वानरगण केंवी भक्षी ॥३२॥ एक एक वानरगण। गांजू शकती कुंभकर्ण। सर्व याची आंगवण। करितां रण कळेल ॥३३॥ देखोनियां मांसें मोठा। म्हणसी कुंभकर्ण लाठा[6]। लागतां वानरचपेटा। धाटामोटा घोळसिती ॥३४॥ आणोनि नीळ सेनापती। स्वमुखें सांगे रघुपती। वानरभार वीर जुत्पत्ती। सन्नद्ध स्थितीं सज्जावें ॥३५॥ शिळा शिखरें द्रुम पाषाण। पर्वतपाणी[7] वानरगण। सन्नद्ध बद्ध सावधान। लंकाभवन रोंधावें[8] ॥३६॥ आलिया रावण कुंभकर्ण। इंद्रजितासगट सैन्य। अवघ्यां करीन रणकंदन। रघुनंदन गर्जत ॥३७॥

---

शब्दार्थ : १. प्राणिमात्राचे संकट, २. आश्चर्यचकित, ३. प्राणिघातक, ४. अत्यंत, फार, ५. सामर्थ्य, ६. पराक्रमी, ७. पर्वत हातात घेऊन, ८. वेढावे.

पळत्या देवोनि नाभिकार[१]। दृढ सज्जिला वानरभार। अरे मी असतां श्रीरामचंद्र। कपींसी मारूं कोण शके।।३८।। नीळें ऐकतां श्रीरामवचन। पळत्या आलें अति स्फुरण। भ्याडा शतधा[२] आंगवण। रणी रावण गांजावया।।३९।। नीळ सेनापति आपण। स्वमुखें करितां गर्जन। ऐकोनि श्रीरामवचन। वानरगण हरिखले[३]।।४०।। श्रीरामांचें आज्ञापन। दृढ रोधावें लंकाभवन। वानरीं करोनि उड्डाण। त्रिकुटीं जाण वळंघले[४]।।४१।। येरीकडे लंकेआंत। भेटावया लंकानाथ। हरिखें कुंभकर्ण जात। तोही कथार्थ अवधारा।।४२।।

सोऽभिगम्य गृहं भ्रातुः कक्षामभिविगाह्य च। ददर्शसीनमाविष्टं विमाने पुष्पके गुरुम्।।२१।।
अथ दृष्ट्वा दशग्रीवः कुंभकर्णमुपस्थितम्। तूर्णमुत्थाय संहृष्टः सन्निकर्षमुपानयत्।।२२।।
अथासीनस्य पर्यंके कुंभकर्णो महाबलः। स जग्राह तदा भ्रातुः पादौ राक्षसपुंगवः।।२३।।
उत्पत्य चैव मुदितो रावणः परिषस्वजे। स भ्रात्रा संपरिष्वक्तो यथावच्चाभिनंदितः।।२४।।
कुंभकर्णस्ततो दिव्यं प्रतिपेदे वरासनम्। स तदासनमश्रित्य कुंभकर्णो महाबलः।।२५।।
संरक्तनयनः क्रोधाद्रावणं वाक्यमब्रवीत्।।२६।।

**कुंभकर्ण रावणाला भेटतो :** कुंभकर्ण महाबळ। भ्रातृभेटीस उतावेळ। जातां सप्त द्वारपाळ। पायां सकळ लागती।।४३।। विमानसदृश सिंहासन। तेथें बैसला दशानन। त्यासी देखोनि कुंभकर्ण। लोटांगण घातलें।।४४।। रावणें उठोनि आपण। हातीं धरोनि कुंभकर्ण। आपणाजवळी आणून। अलिंगन दीधलें।।४५।। पर्यंकारूढ रावण। त्याचे कुंभकर्णे आपण। मस्तकी वंदिले चरण। प्रेम संपूर्ण बंधूचें।।४६।। अतित्वरेनें रावण। सिंहासनींचा उठोन। पुढती दिधलें आलिंगन। समाधान दोघांसीं।।४७।। कुंभकर्ण दशानन। दोघीं देतां आलिंगन। दोघें जाले सुखसंपन्न। समाधान दोघांसीं।।४८।। ते वेळीं रावण उल्लासोन। आपल्या समसमान। कुंभकर्णासी वरासन। संतोषोन दीधलें।।४९।। तया आसनीं कुंभकर्ण। बैसोनियां सावधान। संमुख करोनि दशानन। सादर प्रश्न पूसत।।५०।।

किमर्थमहामत्राद्य त्वया राजन्प्रबोधितः। शंश कस्मद्भयं तेऽद्य को वा प्रेतो भविष्यति।।२७।।
पर्वतांश्चूर्णयिष्यामि दारायिष्यामि मेदिनीम्। देवान्विद्धि वधिष्यामि त्रैलोक्ये पार्थिवानपि।।२८।।
अद्य पश्यंतु भूतानि भक्ष्यमाणानि सर्वशः। सोऽद्य तृप्तिं गमिष्यामि भक्षयित्वा सुरासुरान्।।२९।।
कुम्भकर्णवचः श्रुत्वा जहृषे रावणस्तदा। पुनर्जातमिवात्मानं मेने स रजनीचरः।।३०।।

**रावणाला कुंभकर्ण उठविण्याचे कारण विचारतो :** रावणांसी पुसे कुंभकर्ण। मज उठवावया काय कारण। कोण भय आलें दारुण। मजलागून तें सांगें।।५१।। तुजलागीं लंकानाथा। सुरासुरांच्या करीन घाता। चूर्ण करीन पर्वतां। पृथ्वी आतां विदारीन।।५२।। जरी एक अपराध केला। तो जाण पां प्रेतत्वा[५] गेला[५]। माझेनि हातें रणीं निमाला[६]। संशय या बोला धरूं नको।।५३।। देव दानव मानव। यक्ष किन्नर गंधर्व सर्व। भूतें गिळोनि सावयव[७]। प्रतापगौरव[८] पाहें माझें।।५४।। सुरासुर भक्षून येथ। सहसा मी नव्हें तृप्त। पुढें माझा कार्यार्थ। सावचित्त अवधारीं।।५५।। तुझें वैरी जे समस्त। भक्षावया मी अति क्षुधित। जें जें भक्षूं सांगसी येथ। तें तेंस त्वरित गिळीन।।५६।। ऐकोनि कुंभकर्णाचें वचन। हरखिला दशानन। मरोनि वांचलों आपण। नवा जन्म जाण कुंभकर्णा।।५७।।

अयं ते सुमहन्कालः शयानस्य निशाचर। स्वपितस्त्वं न जानीषे मम रामान्महद्भयम्।।३१।।
एष दाशरथी रामः सुग्रीवसहितो बली। समुद्रं लंघयित्वा तु कुलं नः परिकृंतति।।३२।।

**शब्दार्थ :** १. अभय, २. शंभरपट, ३. आनंद पावले, ४. चढले, ५. मरण प्राप्त करून घेईल. ६. मृत्यू पावला, ७. अवयवांसहित, ८. पराक्रमाचा मोठेपणा.

न देवासुरनागेभ्यो गंधर्वेभ्यः कदाचन । भूतपूर्वं भयं तादृग्यादृशं मानुषादिदम् ॥३३॥

रावणाचे कुंभकर्णाला कथन : ऐकें कुंभकर्णा सावधान। तुवां निद्रा केलिया जाण। मज श्रीरामभय दारुण। जागृति स्वप्न सुषुप्तीं।।५८।। श्रीरामबाणीं रणर्दित[१]। अहर्निशी धुकधुकित। श्रीरामें माझा प्राणांत। जाण निश्चित कुंभकर्णा।।५९।। अश्व ध्वज रथ सारथी। छेदोनि मुकुट पाडिला क्षितीं। विरथी केलें मज क्षीणशक्ती। रणीं रघुपति न मारीच।।६०।। श्रीराम कृपा संपूर्ण। सांपडला न घेच प्राण। देवोनियां जीवदान। रणीं रावण सोडिला।।६१।। अति गर्वी मी लंकानाथ। मोकळा केशीं करोनि विरथ। आणि नागवा हळहळित। लंकेआंत धाडिला।।६२।। पूर्वी ऐसा अपमान। दानव मानव सुरगण। त्याहीपासून अति दारुण। नाहीं अपमान देखिला।।६३।। न[२] भूतपूर्व[२] अपमान[२]। स्वप्नीं न देखे दशानन। तैसाही श्रीरामें गांजून। तृणासमान मज केलें।।६४।। आणिक एक नवल जाण। समुद्रीं तारून पाषाण। करोनियां सेतुबंधन। आला आपण लंकेसीं।।६५।। त्याच्या सेतूच्या परिपाठीं[३]। लंके आल्या वानरकोटी। दुर्ग वेढिले मर्कटीं। आपले दृष्टी पाहें पां।।६६।। वनीं उपवनीं वानरथाटी। दुर्गी झोंबती कोट्यनुकोटी। पैल पाहें लंकात्रिकूटीं। वीर जगजेठी वळंघले।।६७।। करितां वानरांसी रण। विरूपाक्ष अकंपन। प्रहस्त मारिला प्रधान। न लागतां क्षण वानरीं।।६८।। येवढाले महावीर। युद्धा आलिया दुर्धर। नुठी श्रीराम ना सौमित्र। केला रणमार वानरीं।।६९।। सुग्रीवअंगदादि कपिपती। हेही नाहीं आले युद्धार्थी। वानरीं लावोनियां ख्याती। तिघे पुरुषार्थी मारिले।।७०।। विरूपाक्ष अकंपन। एकें हनुमंतें मारिले जाण। नीळें प्रहस्त प्रधान। न लागतां क्षण निर्दळिला।।७१।। नीळें मजसीं करिता रण। मज केलें तृणासमान। गाढी[४] वानराची आंगवण[५]। निधडे[६] दारुण संग्रामीं।।७२।।

ये राक्षसा मुख्यतमा हतास्ते युधि वानरैः। वानराणां क्षयं युद्धे न पश्यामि कदाचन ॥३४॥

रावणाचे आश्चर्य कथन : मुख्य धुरेंसी निशाचर । वानरीं मारिले अपार। एकही न मरेचि वानर। रण दुर्धर करितांही।।७३।। घायीं जर्जर वानरभुज। लाविती श्रीरामचरणरज। सर्वेचि उठोनि कपिसमाज। नाचती भोजें[७] रणरंगी।। ७४।। अपार मरती निशाचर। एकही न मरेचि वानर। हेंचि मज आश्चर्य थोर। दशशिर सांगत।।७५।। तुम्हां श्रीरामामाजी जाण। वैर पडावया काय कारण। ऐसें पुससी जरी आपण। तरी समूळ निरूपण ऐकावें।।७६।।

पुरा त्वं नाभिजानीषे यदा सीता मया हृता। सीताहरणसंतप्ताद्रामान्मे सुमहद्भयम् ॥३५॥
हंतावेक्षस्व लंकाया वनान्युपवनानि च। सेतुना सुखमागम्य वानरैकार्णवं कृतम् ॥३६॥
नगरं शत्रुणा रुद्धं हता युद्धे सुहृज्जनाः। कोशश्च क्षयितः सर्वः स त्वमद्य प्रपश्यताम् ॥३७॥
त्रायस्वेमां पुरीं लंकां बालवृद्धवशेषिताम्। भ्रातुरर्थे महाबाहो कुरु साहाय्यमुत्तमम् ॥३८॥
मयैवं नोक्तपूर्वी हि भ्रातः कश्चित्परंतप। त्वय्यस्ति तु मम स्नेहः परा संभावना च मे ॥३९॥

सीताहरण केल्याने श्रीराम ससैन्य लंकेवर चालून आल्याचे रावण कुंभकर्णाला सांगतो : तुवां निद्रा केलिया जाण। पंचवटीं जावोनि आपण। मारीच मृगे करोनि छळण। सीताहरण म्यां केलें।।७७।। तेणें रागें रघुनंदन। मेळवोनि वानरसैन्य। करोनियां सेतुबंधन। बळवाहन[८] लंके आला।।७८।। लंके यावया रघुनंदन। मुख्य द्वंद्वी वायुनंदन। विध्वंसोनि अशोकवन। राक्षसकंदन तेणें केलें।।७९।। मारिले वनकर किंकर। पंच सेनानी[९] प्रधानपुत्र। मारिला

शब्दार्थ : १. युद्धांत त्रास पावलेला, २. पूर्वी कधीही न झालेला असा, ३. मार्गाने, ४. मोठा, ५. पराक्रम, ६. धैर्यवान, ७. आनंदाने, ८. पराक्रम हेच वाहन ज्याचें असा, अती बलवान्, ९. सेनापती.

जंबुमाळी महावीर। अखया कुमर मुख्यत्वें।।८०।। अखया कुमरकैवारार्थ। युद्धा जातां इंद्रजित। रणीं करोनि हताहत। केला नि:पात सैन्याचा।।८१।। ब्रह्मपाशाचिये गती। लंके आणिला मारुती। तेणें केली अति ख्याती। सांगों किती सुबंधो।।८२।। जाळोनियां लंकाभवन। मजही देवोनि अपमान। असंख्य राक्षस मारून। गेला निघोन किष्किंधे।।८३।। किष्किंधे जावोनि आपण। घेवोनि आला रघुनंदन। निरोधोनि[1] लंकाभवन। माझें कंदन करूं आला।।८४।। पूर्वी ऐसा काकुलती। नाहीं आलों कोणाप्रती। तूं सखा बंधु रणसाह्यार्थी। यालागीं तुजप्रती सांगितलें।।८५।। सेतुद्वारा वानरवीर। येवोनि वेढिलें स्वनर। विध्वंसिलें लंकापुर। द्वारें द्वार रोधूनी।।८६।। विध्वंसोनि लंकाभवन। रणीं मारिले सुहृज्जन। ठेविले ठायीं भांडार क्षीण। जालें जाण सुबंधो।।८७।। दुर्धर आम्हां आलें विघ्न। माझें करीं पां संरक्षण। लंका रक्षावी आपण। बाळें वृद्धजन कुळ रक्षीं।।८८।। तुझ्या भुजांची मज आस। तुझा अति विश्वास। शत्रुसमुदाय करोनि ग्रास। दु:खक्लेश निवारीं।।८९।। रणीं गांजिलों संपूर्ण । त्वां साह्य करावें आपण। ऐसें सांगतां रावण। आलें रुदन अनिवार्य।।९०।। तूं तव पराक्रमी परम। माझा निरसीं सकळ श्रम। साह्य करीं अति उत्तम। सुखसंभ्रम जेणें वाढे।।९१।। ऐसी हे समूळ कथा। सांगितली यथार्थता। वैरासी मुख्य कारण सीता। जाण तत्वतां सुबंधो।।९२।। प्रयासीं केले सीताहरण। ते त्वां भोगिली आपण। नाहीं म्हणतां रावण। पुसे कुंभकर्ण छळणोक्ती।।९३।।

किं कार्यं प्रतिबोधितो वद सखे रामांगनास्त्याहृता।
सा भुक्ता नहि किं यतो न रमते रामात्परं जानकी।।
राम: किं भवितासि नो शृणु सखे तारामलं श्यामलम् ।
रामांगं भजतो ममापि कपटो भावो हि संशाम्यति।।

कुंभकर्णाचे प्रतिवचन व सूचना : कुंभकर्ण म्हणे लंकानाथा। मज उठविलें कोण्या अर्था। सीताहरण दु:खावस्था। तुज तत्वतां सांगावया।।९४।। हरूनि आणिली जे सीता। ते त्वां भोगिली लंकानाथा। रामावांचून सर्वथा। आणिकेंसीं सीता रमेना।।९५।। रूपरेखा लक्षलक्षण। हावभाव कटाक्ष गुण। चाप सज्जोन ठाणमाण। गंभीर गहन विन्यासें[2]।।९६।। श्यामसुंदर कमलनयन। श्रीराम होवोनि आपण। सीता न भोगावया काय कारण। कुंभकर्ण पूसत।।९७।। नानापरींच्या लंकानाथा। मावा[3] जाणसी समस्ता। श्रीराम होवोनि भोगितां सीता। विलंबता का केली।।९८।। कुंभकर्णा ऐक आतां। तुज मी सांगेन तत्वतां। माव न चले श्रीरघुनाथा। छळणें[4] सीता न भोगवे।।९९।। मज स्वयें श्रीराम होतां। कैंचा राम कैंची सीता। ठाव नाहीं लंकानाथा। भोग्य भोक्ता असेना।।१००।। नाहीं तेथें ध्येय[5] ध्याता[6]। नाहीं तेथें कर्म कर्ता। समूळ तेथें नाहीं सीता। नाहीं भोक्ता रावण।।१।। नाहीं द्रष्टा दृश्य दर्शन। नाहीं धर्माधर्मलक्षण। नाहीं कर्म क्रिया आचरण। मीतूंपण असेना ।।२।। श्रीराम होतां इत्यंभूत[7] । जनीं विजनीं श्रीरघुनाथ। भूतमहाभूतें समस्त। सदोदित श्रीराम।।३।। श्रीराम जीवन[8] पावन। श्रीरामही हुताशन[9]। श्रीराम दशदिशा आपण। जग संपूर्ण श्रीराम।।४।। ऐसें मज श्रीराम होतां। समूळ तेथें नाहीं सीता। काय म्यां भोगावें गा आतां। रावण भोक्ता असेना।।५।। ऐकतां रावणाचें वचन। कुंभकर्णा आलें रुदन। श्रीराम परब्रह्म परिपूर्ण। कुळनिर्दळण विरोधें।।६।। माया बाधेना श्रीरघुनाथा। कपटें भोगवेंना सीता। ऐसें कळोनि

शब्दार्थ : १. वेढा घालून, २. शरीररचनेने, ३. कपटविद्या, ४. कपटाने, ५. ज्याचे ध्यान करावयाचे तो, ६. ध्यान करणारा. ७. यथार्थपणे, ८. उदक, ९. अग्नी.

लंकानाथा। विरोध वृथा कां करिसो ॥७॥ कपटें श्रीराम स्वयें होतां । पावली पूर्ण अगाधता। त्यासीं सप्रेम भावें भजतां। स्वानंदता सुखवास॥८॥ समुद्रीं तारिले पाषाण। त्यासीं अवश्य रिघावें शरण। सखा करोनि रघुनंदन। सुखसंपन्न नांदावें॥९॥ श्रीरामस्वरूपाची प्रतीती[१]। तुज बाणली लंकापती। विरोध सांडोनियां चित्तीं। शरण रघुपती निघावें॥१०॥ रामासीं निघाल्या शरण। स्वप्नी नाहीं जन्ममरण। विघ्नचि हो निर्विघ्न। सुखसंपन्न नांदावे॥११॥ शरण रिघाल्या श्रीरघुनाथा। भयचि होय निर्भयता। सख्य केलिया काकुत्स्था[२]। अति श्लाघ्यता[३] तिहीं लोकीं ॥१२॥

स तु श्रुत्वा महाराजः कुम्भकर्णस्य भाषितम्।भृकटिं चैव संचके क्रुद्धश्चैवमुवाच ह॥४१॥
मान्यो गुरुरिवाचार्यः किं मां त्वमनुशाससि। किंवा कृच्छ्रगतं कर्तुंकालयुक्तं विधीयताम् ॥४२॥
अस्मिन्काले तु यद्युक्तं तदिदानीं विचिन्त्यताम्। ममापनयजं दुःखं विक्रमेण समीकुरू॥४३॥
क्रुद्धोऽयमिति विज्ञाय शनैः श्लक्ष्णमुवाच ह। कुम्भकर्णः शनैर्याक्यं बभाषे परिसांत्वयन्॥४४॥

रावणाचा उद्वेग व क्रोधाविष्कार : शत्रु मर्दील कुंभकर्ण। उल्लासें प्रबोधी रावण। तो म्हणे रामा निघावें शरण। तेणें उद्विग्र लंकेश॥१३॥ श्रीरामा निघावें शरण। निश्चय वदला बिभीषण। तैसेंचि वदला कुंभकर्ण। तेणें रावण अति दुःखी॥१४॥ ऐकतां कुंभकर्णउत्तर। रावण कोपला दुर्धर। नेत्र भोवंडी चक्राकार। भृकुटी विक्राळ सक्रोध॥१५॥ कुंभकर्णी सुनी[४] दृष्टी। रावणें भंवयां दिधली गांठी। क्रोधें खवळला पोटीं। वदतां गोष्टी साशंक॥१६॥ क्रोधानुवादें कुंभकर्ण। बिभीषणाऐसा आपण। श्रीरामासीं गेलिया शरण। मग रक्षण मज कैंचें॥१७॥ यालागीं स्वयें दशानन। निजक्रोधातें आंवरून। कुंभकर्णासी मृदु वचन। कोपयामान अनुवादे॥१८॥ जेंवी का शिष्यांसी नेमून। सद्गुरु करी आज्ञापन। तैसाचि तूं मजलागून। निग्रहून[५] वदतोसी॥१९॥ मी ज्येष्ठ तूं कनिष्ठ। ही सांडोनि नीट वाट। धरोनि जाणिवेचा[६] लोट। गुरुत्वें स्पष्ट नेमिसी मज॥२०॥ शत्रु निर्दाळिसी करोनि रण। तुझा भरंवसा होता पूर्ण। शेखीं[७] श्रीरामा निघावें शरण। निग्रहून वदतोसी॥२१॥ बहु बोलाचें काय कारण। उचित काळ अनुलक्षून। माझिया साह्यालागीं जाण। करावें रण रामासीं॥२२॥ बहुतां दिवसांचा क्षुधित। उठलासि निद्रिस्थ। श्रीरामवानरांचा घात। करीं निःपात निजभक्षें॥२३॥

कुंभकर्णाचे रावणाला प्रत्युत्तर : कुंभकर्ण अति सज्ञान। कोपला देखोनि रावण। त्यासी द्यावया समाधान। काय आपण अनुवादे॥२४॥ श्रीरामेंसी नरवानरां। देखोनियां दशशिरा। मीच कांपतो थरथरां। मृत्यु खरा हा आम्हां॥२५॥ नारदाचे त्रिसत्य[८] सत्य वचन। सुटल्या श्रीरामाचे बाण। रावण इंद्रजित कुंभकर्ण। कुळनिर्दळण राक्षसां॥२६॥ त्रिसत्य सत्य नारदवचन। तुज त्यासीं कोठें दर्शन। कैसें केलें संभाषण। पुसे रावण साक्षेपें॥२७॥ एका जनार्दना शरण। नारदइतिहासलक्षण। हें मुळींचे रामायण। सावधान अवधारा॥२८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणकुंभकर्ण संवादो नाम एक-विंशतितमोऽध्यायः॥ ओव्या॥ ॥१२८॥ श्लोक ४४॥ एवं॥१७२॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

---

शब्दार्थ : १. अनुभव, २. ककुत्स्थवंशांतील रामाला, ३. स्तुत्यता, ४. घालून, ५. ताब्यांत ठेऊन, ६. ज्ञानाचा, ७. शेवट, ८. त्रिवार सत्य, अगदी सत्य.

# अध्याय बाविसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## वानरसैन्य मोजण्यासाठी रावण हेर पाठवितो

कुंभकर्ण नारदाची उक्ती सांगतो : नारदसंवाद -लक्षण। समूळ मूळीचें रामायण। रावणासी कुंभकर्ण। स्वयें आपण सांगत॥१॥

शृणुष्वेदं महाराज मम वाक्यमरिंदम। यदर्थं तु पुरा सौम्य नारदाच्छ्रुतवानहम्॥१॥
षण्मासादहमुत्थाय अशित्वा भक्ष्यमुत्तमम। न च तृप्तो ऽस्मि राजेंद्र ततोऽहं प्रस्थितो वने॥२॥
बहूनि भक्षयित्वाहं सत्वानि विविधानि वै। भुवत्वा चाप्रीणनं कृत्वा शिलातलमुपाविशत॥३॥

शत्रुदमनीं अति समर्था। ऐकें बापा लंकानाथा। नारदमुखें मी ऐकिली कथा। सावधानता[१] अवधारीं॥२॥

कुंभकर्ण - नारद भेट : सहा मासां मज जागेपण। खातां उत्तम अन्नपक्वान्न। तृप्ती न पवेचि संपूर्ण। मग मी आपण वना गेलों॥३॥ जावोनियां वनाप्रती। भक्षितां जींव नानाजाती। तेणें मज जाली तृप्ती। अति विश्रांती पावलों॥४॥ अति विस्तीर्ण शिळातळ। वरी छाया सुशीतळ। तेथें बैसलों मी निश्चळ। नभोमंडळ निरीक्षोनि॥५॥ तंव ब्रह्मवीणाझणत्कार। करीत रामनामाचा गजर। येतां नारदमुनीश्वर। नभीं[२] स्तवर म्यां देखिला॥६॥ दिव्य चंदनाची उटी। त्रिपुंड्र रेखिला ललाटीं। दिव्य वनमाळ कंठीं। स्वानंदपुष्टीं डुल्लत॥७॥

शिलातलस्थोऽपश्यं वै नारदं शशिसमप्रभम्। आकाशेन द्रुतं यांतं मां च दृष्ट्वा स तु स्थितः॥४॥
अवतीर्णश्च सहसा मया चैवाभिवादितः। उपविष्टः शिलायां तु ततोऽहं तु तमब्रुवम॥५॥
कुत आगम्यते ब्रह्मन्कुतो वा प्रतिगम्यते। एवमुक्तो महाराज नारदो मामुवाच ह॥६॥
देवानाभालयं मेरुं गतोऽहं देवसंसदि। युष्मत्तो भयभीतानां समाजस्तत्र सम्बभौ॥७॥

मेरुपर्वतावर झालेल्या देवसभेचा वृत्तांत : तपस्तेजें देदीप्त। तेजें शशिसूर्य लपत। नारद नभोमंडळी येत। अकस्मात देखिला॥८॥ मज नारदें देखोनि नयनीं। क्षणैक स्थिरावला गगनीं। सवेंचि उतरोनि अवनीं[३]। आला मुनि मजपासीं॥९॥ मग म्यां उठोनि आपण। मुनीस घातलें लोटांगण। मस्तकीं वंदोनियां चरण। शिळातळीं बैसविला॥१०॥ शिळातळीं बैसविल्या जाण। मुनीसी म्यां पुसिला प्रश्न। कोठोनि तुमचें आगमन। पुढारें[४] गमन तें कोठें॥११॥ ऐसा पुसतां प्रश्न। नारद हांसे गदगदोन। मग साक्षेपें[५] आपण। सकारण गुज सांगे॥१२॥ मेरुगिरीवर देवसभेंत। तुमचेनि भयें भीत। समाज मिळाला समस्त। रावणांतउपाय[६]॥१३॥ देव दानव मानव। यक्षोरग[७] ऋषि गंधर्व। ब्रह्मा विष्णु सदाशिव। सर्व समुदाय मिळाला॥१४॥

मंत्रं संमंत्रिरे तत्र वधे रक्षः कुलस्य च। देवराजो निबद्धश्च यमः संख्ये पराजितः॥८॥
जितौ तु सबलौ संख्ये कुबेरवरुणावपि। यज्ञा विध्वंसिताः विध्वंसिताः सर्वे धर्मिष्ठाश्च हता नृपाः॥९॥
देवोद्यानानि भग्नानि स्त्रियो नीता यथेप्सितम्। चिंतयध्वं वधोपायं रावणस्य दुरात्मनः॥१०॥
एवमुक्ते तु वचने ब्रह्मा देवानुवाच ह। अवध्यत्वं मया दत्तं दैवदैत्यैश्च राक्षसैः॥ ११॥
मानुषेभ्यो भयं तस्य वानरेभ्यश्च देवताः॥१२॥

शब्दार्थ : १. लक्षपूर्वक, २. आकाशात, ३. पृथ्वीवर, ४. यानंतर, ५. आग्रहाने, ६. रावणाच्या वधाकरिता, ७. यक्ष व सर्प.

रावणाच्या अतिक्रमणाबद्दल देवांच्या सभेत वाटाघाट : तेथें मिळोनि देवसमुदाय। रावणवधाचा उपाव। मुख्य रावणाचा अन्याव। साभिप्राव तो ऐका ॥१५॥ मुख्य इंद्र घातला बांधवडीं[1]। आणीक देव तेहतीस कोडी। कुबेर जिंतला रणधांदडीं[2]। केलीं बापुडीं यमवरुणें॥१६॥ विध्वंसिले याज्ञिक यज्ञ। मारिले धार्मिक जन। मारिले अग्निहोत्री ब्राह्मण। अन्याय संपूर्ण लंकेशा॥१७॥ चैत्रवन नंदनवन। विध्वंसूनि देवोद्यान[3]। येणें वाढविलें अशोकवन। स्त्रियांसीं रमण रमावया॥१८॥ देवस्त्रिया असुरस्त्रिया। नागकन्या पद्मिनी प्रिया। बळेंचि आणिल्या धरोनियां। मुख्य अन्याया हें मूळ॥१९॥ परदारांचें[4] जें हरण। हाचि अन्याय अति दारुण। यालागीं रावणाचें जें मरण। अवघे जाण चिंतिती॥२०॥ तेथें बोलिला ब्रह्मदेव। माझ्या वचनाचा अभिप्राव। मिळाल्या सुरसमुदाव। तरी दशग्रीव अवध्य॥ २१॥ दारहरणकैवारा। करूं आल्या नरवानरां। तत्काळ मरण दशशिरा। सत्य साचार ब्रह्मवाणी॥२२॥

सुरासुरसमूहेऽपि वधस्तस्य विद्यते। तस्मादेष हरिर्देवः पद्मनाभस्त्रिविक्रमः॥१३॥
पुत्रो दशरथस्यास्तु चतुर्व्यूहः सनातनः। भवंतो वसुधांगत्वा विष्णोरस्य महात्मनः॥१४॥
वानराणां तनुं धृत्वा सहायत्वं करिष्यथ। एवुमक्त्वा ततो ब्रह्मा तत्रैवांतरधीयत॥१५॥
एतदाख्यातवान्मह्यं नारदो भगवानृषिः। यथातत्त्वमशेषेण ततो यातः सुरालये॥१६॥
सोऽयं विष्णुः सुरैः सार्द्धं वानरत्वमुपागतैः। तन्मह्यं रोचते सीता रामाय प्रतिदीयताम्॥१७॥
नमस्व रामं राजेंद्र रक्ष चात्मानमात्मना। योग्यश्च राघवो मित्रं संधिश्चैवोत्तमो भवेत्॥१८॥

ब्रह्मवराने सुरासुरी अवध्यता आणि वानर मानवांकडून रावण वध होईल असा वृत्तांत : सुरासुरीं अवध्यता। ब्रह्मवरदें लंकानाथा। नरवानर याच्या घाता। होय सांगता स्वयंभू[5]॥२३॥ पद्मनाभ विष्णु विख्यात। तो होईल दशरथाचा सुत। रामलक्ष्मणशत्रुघ्न भरत। व्यूह चतुर्थ पुरुषार्थे॥२४॥ रणीं गांजावया दशशिर। सकळ जे कां सुरवर। होती दुर्धर वानरभार। निशाचर मारावया॥२५॥ वानर साह्य श्रीरामासीं। श्रीराम रक्षिता वानरांसी। ऐसें ब्रह्मयानें देवांपासी। निश्चयेंसी नेमिलें॥२६॥ मिळोनियां वानरभार। रणीं मारिती निशाचर। श्रीराम मारील दशशिर। सबधुंपुत्र ससैन्य॥२७॥ परम कपटी इंद्रजित। अभिचारी[6] निकुंबळेआंत। त्याचा सौमित्री करील घात। निजपुरुषार्थप्रतापें॥२८॥ नरवानर मिळोन। करितील राक्षसां निःसंतान। ऐसें विरंचिवरदान। ब्रह्मवचन नव्हे मिथ्या॥२९॥ वर वदोनियां स्पष्ट। ब्रह्मा जाला अदृष्ट। ते हे नरवानर सुभट। आले यथेष्ट लंकेसीं॥३०॥

रामांना सीता परत करून शरण जावे अशी कुंभकर्णाची रावणाला सूचना : आमच्या नाशासी कारण। समुद्रीं तरती पाषाण। रावणा निश्चयेंसीं जाण। आले मरण आम्हांसी॥३१॥ मिथ्या न होय नारदवचन। जालें प्रत्यक्ष प्रमाण। ते हे वानर जाण। आले गर्जोन लंकेवरी॥ ३२॥ राक्षस मरती कपि न मरती। तुवांचि सांगितलें मजप्रती। काळ साह्य रघुनाथीं। जाण निश्चितीं लंकेशा॥३३॥ श्रीराम परमात्मा ब्रह्ममूर्ती। विरोध न करावा त्याप्रती। त्यासी अर्पून सीता सती। सुखसंवित्ती[7] भोगावी॥३४॥ राक्षस मरती कपि न मरती। हे आत्मत्वाची निजप्रतीती[8]। समुद्रीं पाषाण तरती। दुजी प्रतीती ईश्वरत्वाची॥३५॥ जेणें भंगिलें शिवचाप। त्यासीं न चले गा प्रताप। देखतां विरोधें श्रीरामरूप। येतो चळकांप सर्वांगीं॥३६॥ श्रीरामासी करितां रण। प्राणांते जालासी क्षीण। रणीं रामें दिधलें जीवदान। त्यासीं कां शरण न रिघावें॥३७॥

शब्दार्थ : १. बंदींत, कैदेत, २. युद्धाची गर्दी करून, ३. देवांचे बगीचे, ४. दार = स्त्री, ५. ब्रह्मदेव, ६. जारणमारण विधी करणार, ७. सुखानुभव, ८. अनुभव.

आत्मसत्ता ईश्वरसत्ता। नित्य अधीन श्रीरघुनाथा। त्यासीं न ये विरोध करितां। अर्पून सीता करीं सख्य ॥३८॥ घालोनियां लोटांगण। सीता करोनि रामार्पण। श्रीरामासीं रिघाल्या शरण। सुखसंपन्न सर्वदा ॥३९॥ श्रीरामासीं रिघोनि शरण। मुख्यत्वें वांचवीं निजप्राण। तोचि सकळ कुळा संरक्षण। आमचेंही मरण चुकेल ॥४०॥ श्रीरामासीं रिघाल्या शरण। स्वप्नीं नाहीं जन्ममरण। विघ्नाचें होय निर्विघ्न। सुखसंपन्न सर्वदा ॥४१॥ सती श्रीरामाची सीता। स्वयें श्रीरामासी अर्पितां। तुज संदेह कोण लंकानाथा। विरोध वृथा कां करिसी ॥४२॥

कुंभकर्णवचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः। तूष्णींभूतश्चिंतयित्वा ततो वाक्यमुवाच ह ॥१९॥
कुंभकर्ण महाप्राज्ञ कुरुष्व वचनं मम। कोऽसौ विष्णुरिति ख्यातो यस्मात्त्वं तात बिभ्यसे ॥२०॥
दैवत्वेन न मन्येऽहं तथान्ये देवदानवाः। मानुषत्वं गते तस्मिन्किं भयं त्वामुपस्थितम् ॥२१॥
नित्यमाहारभूतास्तु मानुषाः स्म सदाबलाः। खादयित्वा तु यं पूर्वं कथं पश्चान्नमाम्यहम् ॥२२॥
प्रणम्य मानुषं रामं सीतां दत्वा तु तस्य वै। हास्यस्पदत्वं लोकानामनुयास्यामि पृष्ठतः ॥२३॥

**कुंभकर्णाची सूचना रावणाला अमान्य :** ऐकानि कुंभकर्णाचें वचन। रावणा पडियेलें मौन। महादुःखें आंदोलायमान[1]। अति उद्विग्न सचिंत ॥४३॥ ज्याचेनि बळें करावें रण। तोचि कुंभकर्ण आपण। सीता श्रीरामासी अर्पून। रिघावें शरण सांगत ॥४४॥ बिभीषण येच अर्थीं[2]। नाना परींचिया उपपत्ती। चाळूनियां सर्व युक्ती। शरण रघुपती रिघा म्हणे ॥४५॥ संमुख लक्षोनि कुंभकर्ण। सरोष बोले रावण। झोंपें जालासि सज्ञान। बोलसी वचन चापल्यें ॥४६॥

**रावणाची विचारसरणी :** विष्णु विष्णुपणें असतां। मज संमुख न येचि युद्धार्था। तो नीचत्वें आला मनुष्यता। त्याची सभयता ते किती ॥४७॥ मनुष्य विष्णु स्वयें सांगती। सांगसागों स्वयें भिसी। शेखीं मजसी भेडसाविसी। थोर जालासी पुरुषार्थी ॥४८॥ मनुष्य आमचें खाजुकें[3]। सगळीं भक्षूं यथासुखें। तूं भितोसी त्याचेंनि धाकें। थोर तवकें[4] पुरुषार्थी ॥४९॥ अति धाकें धाकोनि थोर। अजासी वंदितां लाजे व्याघ्र। तेंवी म्यां वंदितां श्रीरामचंद्र। लज्जा थोर मज माझी ॥५०॥ मनुष्य आमचा आहार। त्यासी म्यां करावा नमस्कार। तैं मज हांसती सुरासुर। निशाचर उपहासिती ॥५१॥ रणीं इंद्र आणितां बांधोन। बंदी घालितां सुरगण। विष्णु लपला भेण। न करीच रण अतिं धाकें ॥५२॥ विष्णूसकट इंद्रादि देव। दैत्य दानव मानव। म्यां तृणप्राय केले सर्व। त्या मज भय मनुष्याचें ॥५३॥ श्रीराम मनुष्यमात्र जाण। सीता अर्पून रिघावें शरण। हे मज लज्जा अति दारुण। भय कोण रामाचें ॥५४॥ सर्पें वंदावे मूषकासी। गरुडें वंदावे सर्पासी। तेंवी भक्ष्यभूत श्रीरामासी। केंवी म्यां त्यासी वंदावें ॥५५॥ पूर्वीं भक्षिले मनुष्यांसी। तेंचि मनुष्यत्व श्रीरामासीं। मज शरण रिघतां त्यासी। उपहासासी पावेना ॥५६॥ श्री रामाचे शरणपणें। नित्यावृत्ती त्यांचें होणें। पाठीसीं चालतां रावणें। लाजिरवाणें तिहीं लोकीं ॥५७॥

यदि वा राघवो विष्णुर्व्यक्तं ते श्रोत्रमागतः। देवतानां हितार्थाय प्रविष्टो मानुषीं तनुम् ॥२४॥
अत्यंतं वैरिणं रामं यं नमस्कर्तुमिच्छसि। अस्मान्हंतुं किलायातः स संधेयः कथं मया ॥२५॥
यदि रामः स्वयं विष्णुर्लक्ष्मणः शेषसंमितः। स वानराणां राजानं सुग्रीवं शरणं गतः ॥२६॥
अहोस्य सदृशं सख्यं तिर्यग्योनिगतैः सह। वीर्यहीनस्तु किं विष्णुर्योगतो ऋक्षवानरान् ॥२७॥

**रावणाची दर्पोक्ती :** श्रीराम विष्णु तत्वता[5]। मुनि मुखें त्वां ऐकिली कथा। तो देवांचियां हितार्था। आमुच्या वधार्था मनुष्य जाला ॥५८॥ विचारितां निजनिर्धारीं। श्रीराम आमुचा

**शब्दार्थ :** १. घोटाळ्यात पडलेला, २. उद्देशाने, ३. खाद्य, ४. बलाने, ५. खरेपणाने.

अत्यंत वैरी। त्यांसीं अर्पूनि सीता सुंदरी। म्हणसी तूं करीं नमस्कार।।५९।। आमुच्या वधाकारणें। श्रीरामें मनुष्यत्व धरणें। त्यासीं म्या सख्य करणें। जीवें प्राणें घडेना।।६०।। सर्पा मुंगसासीं सौजन्य[1]। करीवी ऐसा आहे कोण। तेंवी राम आण रावण। सख्य संपूर्ण घडेना।।६१।। श्रीरामासीं सौजन्य। करूनि देतां अलिंगन। खेंवा[2] सर्वेंचि मी गिळीन। मनुष्यभक्षण तें आम्हां।।६२।। केळें दिधल्या वानरा करीं। तें काय आठ प्रहर धीर धरी। तत्काळचि गटका करी। तेंवी खेंवामाझारीं श्रीराम।।६३।। श्रीराम विष्णु जरी आपण। सौमित्र शेषावतार संपूर्ण। तरी कां सुग्रीवा गेला शरण। शुद्ध्यर्थ जाण सीतेच्या।।६४।। श्रीरामासीं विष्णुत्व कदा न घडे। सीतेलागीं होवोनि वेडें। वनीं रडे पडे झडे। विष्णुत्व घडे कैसेनि।।६५।। तिर्यग्योनी[3] जे वानर। पालेखाइरे वनचर। त्यांच्याशीं सख्य करी रामचंद्र। तो राघवेंद्र अति नीच।।६६।। विष्णूसीं नाहीं पुरुषार्थ[4]। बळींसीं न करीच युद्धार्थ। छळणें झाला तो अतीत। यज्ञ समयीं याचक।।६७।। स्वयें वामनरूपें मागोन । त्रिविक्रमाक्रमें घेतां जाण। समुद्रमेखळा पृथ्वी दान। करोनी छळण घेतली।।६८।। पृथ्वी घेवोनियां दान। सर्वेंचि कैसा कृतघ्न। दैत्यासीं लाविलें बंधन। कपटी पूर्ण श्रीविष्णु।।६९।। पुढिलासी[5] करितां छळ। सदाचें अपेशी कपाळ। बळीनें केला द्वारपाळ। सर्व काळ तिष्ठत।।७०।। कुडा कपटी हीन दीन । विष्णूसीं नाहीं आंगवण। त्यांतही आलें मनुष्यपण । आम्हीं कां शरण रिघावें।।७१।। उपकार अपकार करणें। याच परी विष्णूचें जिणें। त्यासीं म्यां शरण रिघणें। लाजिरवाणें तिहीं लोकीं।।७२।।

यदा मे निर्जिता देवा: स्वर्गं गत्वा त्वया सह। तदा किं नास्ति विष्णुत्वं तस्य देवस्य राक्षस।।२८।।
सांप्रतं कुत आयात: स विष्णुर्येन बिभ्यसि। शरीररक्षणार्थाय ध्रुवं ते वाक्यमीदृशम्।।२९।।
नायं क्लीबयितुं काल: कालो युद्धे निशाचर। आयु: पितामहात्प्राप्तं त्रैलोक्यं च वशीकृतम्।।३०।।
राघवं प्रणमे कस्माद्धीनवीर्यपराक्रमम्। गच्छ स्वशयनीयाय शश्वत्वं विगतज्वर:।।३१।।
शयानं न च हन्यात्वां राघवो लक्ष्मणस्तदा।।३२।।

**कुंभकर्णाचा धिक्कार करून रावणाची सिद्धता :** पूर्वी तुजसमवेत म्यां जाण। स्वर्गी जिंतिले देवगण। तैं कां विष्णु न करी रण। आतां आंगवण त्या कैंची।।७३।। विष्णूस असतें विष्णुपण। तैं मजसीं न करीच रण। आतां आलें मनुष्यपण। त्यासीं कुंभकर्ण भयभीत।।७४।। श्रीरामासी करवे रण। आपुला वांचवावया प्राण। रघुनाथा रिघावें शरण। भय संपूर्ण आम्हां सुचविसी।।७५।। क्लीब[6] आणि दिससी लाठा[7]। वृथा वाढलासी काग[8] दिवटा। हीन दीन तूं मांसमोठा[9]। अति करंटा नपुंसक।।७६।। आपुलिया मरणाभेण । श्रीरामा रिघा म्हणसी शरण। हें तुझें भ्याडपण। मज संपूर्ण कळों सरलें।।७७।। आजिंचा युद्धकाळ दारुण। तुवां सांडिली आंगवण। आतां जावोनि करीं शयन। अनुद्विग्न सुचित।।७८।। तुज निजलिया जाण। निद्रितासि रामलक्ष्मण। सर्वथा न मारिती जाण। निजावें आपण सुचित्त।।७९।। तुझी थोर आस होती देख। तिसी म्यां दिधलें[10] तिळोदक[10]। दावूं नकों काळें मुख। जाय आवश्यक करीं निद्रा।।८०।। दीर्घायु दिधलें ब्रह्मयानीं। ते म्यां वश केली अवनीं। तुवां निजोनि दीर्घशयनीं। केली हानि आयुष्या।।८१।। कुंभर्णा भागलासी। निद्सुरा तूं डुकली जासी। जाऊन करावें पूर्ण निद्रेसीं। रण रामासीं मी करीन।।८२।।

अहं रामं वधिष्यामि ससुग्रीवं सलक्ष्मणम् । वानरांश्च वधिष्यामि ततो देवान्महारणे।।३३।।

शब्दार्थ : १. मैत्री, सख्य. २. मिठी मारून, ३. पशुयोनी, ४. पराक्रम, ५. इतराला, ६. नपुंसक, ७. पराक्रमी, ८. कावळा, ९. मांस वाढून मोठा, १० टाकिली, त्याग केला.

विष्णुं चैव वधिष्यामि ये च तस्यानुयायिनः।
गच्छ गच्छ स्वकं धाम चिरंजीव सुखी भव॥३४॥
जानामि सीतां धरणीप्रसूतां जानामि रामं मधुसूदनं वा।
अहं हि जाने स्वयमस्यवध्य स्तेनाहृता मे जनकात्मजैषा॥३५॥
न कामाच्चैव न क्रोधात्त्यजामिजनकात्मजाम्॥३६॥

करोनिया रणकंदन। मुख्यत्वें श्रीरामे वधीन। सुग्रीव वधीन सहलक्ष्मण। वानरगण रणमारें॥८३॥ सुरवरांच्या साह्यासीं। राम आला मृत्युलोकासी। श्रीराम विष्णु सुरवरांसी। मृत्युपासीं धाडीन॥८४॥ सुरवरांचिया थाटी। रणीं मारीन उठाउठीं। मग लागोनि विष्णूच्या पाठीं। रिघोन वैकुंठी मारीन॥८५॥ जे विष्णूचे उपासक। आणि विष्णूचे सेवक। रणीं शोधशोधोनि देख। एक एक मारीन॥८६॥ असो हे वाढिवेची कथा। कोण श्रीराम कोण ते सीता। हें मज कळलें तत्वतां। सावधानता अवधारीं॥८७॥ धरणीपासाव[1] प्रसूता। अयोनिजा[2] सती सीता। परब्रह्मत्व रघुनाथा। मजही तत्वतां कळलेंसे॥८८॥ श्रीरामाचे स्वबोधबाण। त्यांसी म्यां अर्पिला जीवप्राण। तरी सीता देवोनि आपण। श्रीरामा शरण रिघेंना॥८९॥ अभिलाषितां जनकदुहिता। श्रीराम करील माझ्या घाता। तरी श्रीरामा अर्पून सीता। शरण रघुनाथा रिघेंना॥९०॥ सीता अभिलाषितां मज मरण। जाणोनि केलें सीताहरण। सीता न करीं रामार्पण। न रिघें शरण श्रीरामा॥९१॥ राज्यलोभसकामता। न सांडीं मी जनकदुहिता। श्रीराम आला सक्रोधता। तरी मी सीता सोडींना॥९२॥ देहलोभसभयता। मृत्युभय वाजतां माथां। तरी मी न सोडीं गा सीता। निजपरमार्थाचेनि लोभें॥९३॥ ऐकें कुंभकर्णा सावधान। तुझ्या अंगी भेडसपण[3]। वांचवावया निजप्राण। निघावें शरण श्रीरामा॥९४॥ सेवितां श्रीरामाचे पाय जाण। तुज बाधेना जन्ममरण। नित्य निर्भय व्हावया जाण। रिघावें शरण श्रीरामा॥९५॥ सेवितां श्रीरामाचे पाय तुज। बिभीषण होईल साह्य। यालागीं तूं शीघ्र जाय। शरण लवलाहें श्रीरामा॥९६॥ आतां जावोनी करी शयन। कां श्रीरामा रिघें शरण। ऐसें गर्जतां रावण। कुंभकर्ण क्षोभला॥९७॥

कुंभकर्णः पुनर्वाक्यं साश्रुपूर्णमभाषत। अलं राक्षसशार्दूल संतापमुपगम्य हि ॥३७॥
रोषशोकौ परित्यज्य स्वस्थो भवितुमर्हसि। अवश्यं तु हितं वाच्यं सर्वावस्थं महीपतिम् ॥३८॥
बंधुवादादभिहितं भ्रातुः स्नेहाच्च पार्थिव। सदृशं यत्तु कार्येऽस्मिन्कर्तुं स्निग्धेन बंधुना ॥३९॥
अनभिज्ञा हि शास्त्राणां बहवः पशुबुद्धयः। मूर्खमंत्रिगणोपेतो भ्राता मे पापबुद्धिभिः ॥४०॥
वस्त्रांतेनाहरन्नग्निं पापैर्न प्रतिषेधितः॥४१॥

रावणाचा धिक्कार ऐकून कुंभकर्णाला क्रोध, परंतु वस्तुस्थिती सांगतो : रावणाचे कठिण वचन। ऐकोनियां कुंभकर्ण। कोपे नेत्रीं अश्रुपूर्ण। तरी शांत वचन अनुवादे॥९८॥ ऐकें सुबंधो सावधान। परापवादानुवादन[4]। तेणें तुज सुख कोण। करिसी गर्जन दशमुखें॥९९॥ इतरांची गोष्टी कायसी। मजचि सख्या निजबंधूसीं। वर्मीं वाग्बाण विंधिसी। अति क्षोभेंसी क्षोभोनी॥१००॥ विनंती ऐकें दशानना। कोप आंवरून मना। स्वस्थ बैसोनि सावधाना। कार्यकारणा विवंची॥१॥ बंधूनें बंधूच्या हितोक्ती। न पुसतां सांगाव्या भूपती। ऐसी आहे स्नेहाची जाती। तूं कां तदर्थी[5] कोपसीं॥२॥ निजबंधूचें निजहित। स्वयें सांगती कालोचित। आप्तवादें निग्रहांत। नेमून सांगत बंधुत्वें॥३॥ बिभीषणें हित सांगतां। वृथा क्षोभलासी

शब्दार्थ : १. पृथ्वीपासून, २. मातापितरांपासून न जन्मलेली, ३. भित्रेपणा, ४. दुसऱ्यांची निंदा करणे, ५. त्यासाठी.

लंकानाथा। त्यासी हाणोनिया लाता। शरण रघुनाथा धाडिला ॥४॥ त्याचि बिभीषणाच्या वचना। प्रतीति[1] आली दशानना। आतां करितोसी रुदना। स्वहितज्ञाना नेणसी ॥५॥ माझा बिभीषण येथें असता। तरी तो चुकविता अनर्था। ऐसें बोलसी लंकानाथा। शेखीं स्वहिता नेणसी ॥६॥ राजा रावण तूं अगाध। सहावा बंधूचा अपराध। स्वहित मानूनि विरोध। सखा बंधु दवडिला ॥७॥ स्वयें राजा तूं अज्ञान। प्रधान पशुबुद्धिसमाना रामें करितां सेतुबंधन। तैं कां विघ्न न करीचि ॥८॥ सेतु बांधिता रघुनाथा। गर्वें न कळलें लंकानाथा। प्रधान अति उन्मादता[2]। कोणे स्वहिता लक्षावें ॥९॥ लावोनियां भेरी निशाण। लंके आला रघुनंदन। देखोनि वानरांचे सैन्य। आतां उद्विग्न होतसां ॥१०॥ अग्नि बांधोनि वस्त्रांसी। जेंवी नेसविजे शरीरासी । तैसी दशा रावणासीं। केली पापराशी प्रधानीं ॥११॥ आणितां श्रीरामपरदारा। कोणी निषेधिना लंकेश्वरा। अनुमोदून दशशिरा। पापाचारा प्रवर्तविलें ॥१२॥ सीताकोपतेजानुवृत्तीं[3]। राक्षसांची शौर्यशक्ती। निःशेष[4] गेली गा भस्मांतीं। उरले दिसती निर्वीर्य ॥१३॥ अभिलाषितां सीता सती। रावणाची यशःकीर्ती। अवघी जाली गा अपकीर्ती। जग निंदिती नष्टत्वें ॥१४॥ रावण भोगी सीतारत्न। आम्ही रामासीं करूं रण। ऐसें बोलिले प्रधान। काळें वदन तयांचें ॥१५॥ तुमची यश कीर्ति शौर्यवृत्ती। जळाली सीताक्रोधानुवृत्तीं। अवघियांची क्षीण शक्ती। रणीं मारुति न जिंकवे ॥१६॥ एकला एक हनुमंत। तेणें मारिला अखया सुत। इंद्रजित करोनि हताहत। केला निःपात सैन्याचा ॥१७॥ ते काळीं कपींसीं रण। करावया नाही आंगवण । पळाले सैन्येंसी प्रधान। जीव घेऊन लंकेशा ॥१८॥ येथें आणिली सीता सती। तुमची भस्म जाली शक्ती। रणीं न ये यश कीर्ती। जाण निश्चिती लंकेशा ॥१९॥

कुंभकर्णाला रावणाची युद्ध करण्याविषयी विनंती : रावण म्हणे कुंभकर्ण बंधु। किती लाविसी गतापराधु[5]। पुढां ओढवला युद्धसंबंधु। आला सन्नद्ध कपितभार ॥२०॥ ऐकोनि रावणाचें वचन। कुंभकर्णा आले स्फुरण। करावया रणकंदन। काय गर्जोन बोलत ॥२१॥

> नैवमर्हसि वक्तुं त्वं मयि जीवति पार्थिव। तमहं शासयिष्यामि यत्कृते परितप्यते ॥४२॥
> शत्रूणां कदनं पश्य क्रियमाणं मयानघ। अद्य पश्य महाबाहो मया समरमूर्द्धनि ॥४३॥
> हतं रामं सह भ्रात्रा द्रवंतीं कपिवाहिनीम्। अद्य रामस्य दृष्ट्वा त्वं मया नीतं रणे शिरः ॥४४॥
> सुखी भव महाराज सीता भवतु दुःखिता। अद्य रामस्य निधनं पश्यंतु सुमहत्प्रियम् ॥४५॥

कुंभकर्ण युद्धावर जाण्याची तयारी दाखवितो : त्रिसत्य सत्य नारदवचन। श्रीरामबाणीं आम्हां मरण। हेंचि बोलता आपण। दुःखी रावण होतसे ॥२२॥ आम्हां अवश्य आलें मरण। दुःखी न करावा रावण। जेणे पावे सुख संपूर्ण। तैसे आपण अनुवादे ॥२३॥ कुंभकर्ण म्हणे रावणा। मज जीवें जिता जाणा। तुज मी जाऊं नेदीं रणा। रघुनंदनासी युद्धार्थी ॥२४॥ मी घरचा सेवक निजबंधु। असतां स्वामींसीं युद्धसंबंधु। पडो देतां सेवक मंदु। परम बाधु सेवकत्वा ॥२५॥ स्वयें करावया जाईन रणा। ऐसें न बोलावें वचना। तुझ्या शत्रूचे मर्दना[6]। मी करीन लंकेशा ॥२६॥ ज्याचा धाक अहोरातीं। नित्य वाहसी लंकापती। ते म्यां मारिले रणख्याती। मानीं निश्चितीं लंकेशा ॥२७॥ राम लक्ष्मण निधडे दोनी। मी मारीन रणांगणीं। मारीन वानरांच्या श्रेणी[7]। रणभंगाणी[8] कपिकुळा ॥२८॥ रणीं मारिले राम सौमित्र। हें बोलणें अनुमानकर। दोहींचें देईन आणूनि शिर। तरी मी साचार[9] सेवक ॥२९॥ आणिल्या श्रीरामाचें शिर। सुखीं होईल दशशिर। दुःखी होईल सीता सुंदर। ऐसा रणमार करीन ॥३०॥

शब्दार्थ : १. अनुभव, २. गर्विष्ठपणाने, ३. सीतेच्या कोपाग्नीमध्ये, ४. सर्वस्वी, ५. होऊन गेलेल्या गोष्टींबद्दल दोष, ६. नाशाला, ७. समुदाय, ८. युद्धांत पराजय, ९. खरोखर.

रणीं पाडिले राम सौमित्र। स्वर्गीं देखती सुरवर। भूतळीं देखती नर किन्नर। ऐसा रणमार करीन ॥३१॥

अद्य रामं ससौमित्रिं ससुग्रीवं समारुतिम्। सर्वानिकायने हन्मि प्रतिज्ञा मे तवाग्रतः॥४६॥

कुंभकर्णाची आत्मप्रौढी : गर्जोनि बोले कुंभकर्ण। आजिंचें माझें मुख्य रण। शत्रु मारोनि संपूर्ण। आंगवण दावीन मी॥३२॥ श्रीराम आणि लक्ष्मण। अंगद सुग्रीव हनुमान गहन। अवघे मारीन वानरगण। एकला जाण मी एक॥३३॥ रणप्रवीण दोघे येथ। सौमित्री आणि रघुनाथ। त्यांसीं भिडेन रणाआंत। जंव पुरुषार्थ पुरे त्यांचा॥३४॥ दोघे मारून रणाआंत। वानर भक्षीन समस्त। सुग्रीव अंगद हनुमंत। लोणच्यार्थ खाईन॥३५॥ एकला एक मी आपण। ऐसें करीन रणकंदन। रावणा वाहतों तुझी आण[1]। परम प्रमाण हें माझें॥३६॥ म्हणसी ऐसें कोणे काळीं। आजचि आतां ये वेळीं। मर्दून शत्रूंची समफळी। तुजजवळी येईन॥३७॥ सायुध सज्ज सन्नद्ध जाण। युद्धा निघतां कुंभकर्ण। मंदोदरी आली आपण। रणकंदन वारावया॥३८॥ युद्धा जातां कुंभकर्ण। क्षणार्धें राम घेईल प्राण। रणीं निमाल्या कुंभकर्ण। शिष्टाई पूर्ण चालेना॥३९॥ श्रीरामासीं करितां रण। अवश्य मरेल कुंभकर्ण। रावणातें निवारावया जाण। आली आपण मंदोदरी॥४०॥ एका जनार्दना शरण। पुढें गोड निरूपण। मंदोदरी आणि रावण अनुवादन[2] निजगृह्य॥४१॥ स्त्रीपुरुषांचा एकांत। विवादामाजी परमार्थ। बाप[3] लाघवी[4] रघुनाथ। वैरियां देत सायुज्य॥४२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावण कुंभकर्णसंवादो नाम द्वाविंशतितमोऽध्यायः॥२२॥ ओंव्या॥१४२॥ श्लोक॥४६॥ एवं॥१८८॥

## अध्याय तेविसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### रावण - मंदोदरी संवाद

कुंभकर्णाची गर्जना. युद्धाला जाण्याची सिद्धता : सन्नद्ध[5] बद्ध सायुध पूर्ण। युद्धा निघतां कुंभकर्ण काय बोलिला गर्जोन। एकला मारीन अवघ्यातें॥१॥ रामलक्ष्मणां करून घात। वानर भक्षीन समस्त। अंगद सुग्रीव हनुमंत। फळशाखार्थ[6] गिळीन॥२॥ ऐकोनि कुंभकर्णगर्जन। रावणा आलें अति स्फुरण। नगरीं त्राहाटिलें[7] निशाण। युद्धा आपण निघावया॥३॥

कुंभकर्णवचः श्रुत्वा रावणो लोकरावण :। गंतुमैच्छतिक्रोधः सर्वसैन्येत संवृतः॥१॥
संग्राममभिकांक्षंतं रावणं श्रुत्य भामिनी। तत्रोत्थाय ततो देवी नाम्ना मंदोदरी तथा॥२॥
माल्यवंतं करे गृह्य यूपाक्षसहिता तथा। मंत्रिभिर्मंत्रतत्वज्ञैस्तथान्यैर्मंत्रिसत्तमैः॥३॥
छत्रेणाध्रियमाणेन अतिकायपुरःसरा। चामरैर्वीज्यमानैश्च वीज्यमाना स्वलंकृता॥४॥
सेवार्थं मार्गविपुलं ध्वजमाल्योपशोभितम्। उत्सारणं प्रकुर्वद्भिर्वेत्रझर्झरपाणिभिः॥५॥

सवण युद्धावर जाणार हें ऐकून मंदोदरीचे आगमन : रणीं त्राहाटूनि निशाण। युद्धा निघतो दशानन। मंदोदरीनें ऐकोन। आली आपण अति शीघ्र॥४॥ सालंकृत मनोहर। मस्तकी

शब्दार्थ : १. शपथ, २. बोलणे, भाषण. ३. मोठा, ४. कुशल, ५. तयार, ६. फळे किंवा भाजी म्हणून, ७. वाजविले.

शोभे शशांकच्छत्र[१]। ढळताहे युग्मचामर। चाले सुंदर गडगर्जें ॥५॥ माल्यवंत आणि यूपाक्ष। आणीक मंत्री मंत्रदक्ष। विवेकवंत जाणिजे मुख्य। ते ते सकळिक सांगातें[२]॥६॥ सर्वे सखियांचा[२] समाज। मार्गशोभा पुष्पध्वज। राजपत्नीची गमनवोज[३]। दावीत सहज स्वयें चाले॥७॥ मार्ग संकुळितां निवार। करावया[४] वेत्रपाणी[५] वीर। वेत्रनादांचा झणत्कार। तेणें समग्र दूर पळती॥८॥ अतिकाय जो रावणपुत्र। तेणें येवानि धरिले छत्र। देवांतक नरांतक कुमर। युग्मचामर ढाळिती॥९॥ जे सतीत्वाचें निजभूषण। जें रावणराजाचें मंडण। ते मंदोदरी आपण। सभास्थान पावली॥१०॥

प्रविवेश सभां दिव्यां प्रभया द्योतमानया। प्राप्तां देवीं ततो राजा प्रियां मंदोदरीं तदा॥६॥
दृष्ट्वा ससंभ्रमस्तूर्णं परिष्वज्य दशाननः। किमागमनकृत्यं ते देवि शीघ्रं तदुच्यताम्॥७॥
तूर्णं मम समीपन्तु किमर्थं त्वमिहागता। मन्त्रिभिः सहिता किं तु ब्रूहि साध्वि यथातथम्॥८॥

रावण मंदोदरीला येण्याचे कारण विचारितो : मंदोदरी शोभायमान। प्रवेशली सभास्थान। तिसी देखोनि दशानन। दे अलिंगन अति प्रीती॥११॥ रत्नपर्यंकीं आपणापासीं। बैसवोनि निजप्रियेसी। कोण कार्या तूं आलीसी। तें मजपासीं शीघ्र सांगें॥१२॥ प्रधानांसहित सुपुत्र। येथे आलीस अति सत्वर। यथातथ्य जो विचार। तो सांग समग्र मजपासीं॥१३॥ कोण कार्योद्देशासाठीं। तूं आलीस माझिया भेटी। ते सांगावी गुह्य गोष्टीं। प्रीती मोठी मज तुझी॥१४॥

एवमुक्ता तु राजानं प्रिया वचनमब्रवीत्। विश्वस्य शृणु राजेंद्र याचे त्वाहं कृतांजलिः॥९॥
श्रुता मे नगरी रुद्धा श्रुता मे राक्षसा हताः। धूम्राक्षसहिता वीराः प्रहस्तेन सहैव तु॥१०॥
भवान्वै युद्धकामश्च निर्गंतुं कृतनिश्चयः। इति संचिंत्य राजेंद्र ममागमनकारणम्॥११॥

रावणाला मंदोदरीची विनंती : सत्य सांग वा सुंदरी। आलीस कोण[६] कार्यावरी[६]। रावणें पुसतां अत्यादरीं। स्वयें मंदोदरी अनुवादे॥१५॥ कर जोडून तुम्हांप्रती। बहुतां दिवसां करितें विनंती। अवधारोनियां भूपती। माझी वचनोक्ती करावी॥१६॥ स्त्रियेचें वचन केवळ ममता। तैसें नव्हें गा लंकानाथा। जें उपयोगी अर्थस्वार्था। जें परमार्था पावेन॥१७॥ समुद्रीं तारोनि पाषाण। लंकेसी आले राम लक्ष्मण। वानरी रोधिलें लंकाभवन। हें अपूर्व देखोन मी आलें॥१८॥ वानरीं व्याप्त लंकाभवन। रणीं मारिले राक्षस गहन[७]। धूम्राक्ष आणि अकंपन। मुख्य प्रधान प्रहस्त॥१९॥ त्यांचे संगतीं थोर थोर। रणीं पडले निशाचर। एकही न मरेचि वानर। युद्ध दुर्धर करितांही॥२०॥ प्रहस्तादि वीर दारुण। कडकडाटें करितां रण। नाहीं उठले राम लक्ष्मण। वानरीं भिडोन मारिले॥२१॥ प्रहस्त एवढा वीर गहन। नीळें मारिला न लागतां क्षण। येरा[८] राक्षसांसी जाण। केलें कंदन वानरीं॥२२॥ राक्षसां करावया घात। मूळीं लागला हनुमंत। जो जो येतो युद्धाआंत। त्याचा निःपात करीतसे॥२३॥ ऐसें जाणोनि संपूर्ण। श्रीरामासी करावया रण। केंवी निघतां आपण। मुख्यत्वें प्राण द्यावया॥२४॥ काल श्रीरामें रणांगणी। सोडिलासी जीवदानीं। तें नाठवे तुझ्या मनीं। पुढें मरावया रणीं धावसीं॥२५॥

न त्वं युक्तं प्रमुखतः स्थातुं तस्य महात्मनः। राघवस्य सौमित्रेर्यस्य नास्ति समो युधि॥१२॥
न च मानुषमात्रोऽस्ति रामो दशरथात्मजः। एकेन येन वै पूर्वं बहवो राक्षसा हताः॥१३॥

मंदोदरीचे श्रीरामांच्या पराक्रमाविषयी विवेचन : श्रीरामासीं संमुख। राहूं न शके दशमुख।

---

शब्दार्थ : १. चंद्राप्रमाणे शुभ्रवर्णाचे छत्र, २. बरोबर, ३. चालण्याची पद्धती, ४. गर्दी मोडण्यासाठी, ५. भालदार, ६. काय काम योजून, ७. मोठे बलवंत, ८. इतर.

रामप्रताप अलोलिक। राक्षसांतक श्रीराम॥२६॥ ताटिका मारिली बाळपणीं। मारीच उडविला बाण पिसारेनीं। सुबाहु मारिला यज्ञस्थानीं। राक्षसश्रेणीं समवेत॥२७॥ रामें हरचाप[1] भंगून। सभेमाजी दशानन। यथेष्ट पावला अपमान। श्रीरामेंसीं रण तुम्हां न टिके॥२८॥ येच सीतेच्या अभिलाषमेळीं[2]। विराध मारिला आतुर्बळी। एक बाणें केली होळी[3]। वनसमेळीं श्रीरामें॥२९॥ शूर्पणखा करितां छळण। तिचे घेतले नाक कान। तिच्या कैवारालागीं जाण। केलें कंदन राक्षसां॥३०॥ एकला पदाति[4] श्रीरामचंद्र। मारिले त्रिशिरा दूषण खर। चवदा सहस्र निशाचर। रामें समग्र मारिले॥३१॥ मारीच लागला मृगसमेळीं। कबंध छेदिला बाहुमेळीं। बाणें एकें छेदिला वाळी। जो आतुर्बळी तिहीं लोकीं॥३२॥ तुम्ही उद्विग्न वाळिभेण। त्याचा श्रीरामें घेतला प्राण। त्या श्रीरामासीं करावया रण। आंगवण तुम्हां कैची॥३३॥ समुद्रीं तारोनि पाषाण। लंके आणिले वानरगण। श्रीराम मनुष्य नव्हे जाण। अवतार पूर्ण परब्रह्म॥३४॥ सीता देवोनि त्रिशुद्धी। रामासीं करावा संधी[5]। श्रीरामेंसी रणसमृद्धी। विजयसिद्धी तुम्हां नाहीं॥३५॥

प्रहस्तेन कृतं किंचिद्युध्यता राक्षसे बले। धूम्राक्षेण च राजेंद्र नित्यं समरगाहिना॥१४॥
महाकायेन च तथा महामायेन राक्षस। अकंपनेन वीरेण युध्यता राक्षसेश्वर॥१५॥
तथा तैर्युध्यमोनश्च किं कृतं वानरे बले। न हतो यूथपः कश्चिद्बलाद्द्वेषेण रावण॥१६॥
येषां नास्ति समो वीर्ये ते हता वानरैर्युधि। न चापि वानराः शक्या हंतुं पादपयोधिनः॥१७॥

रावणबळेंसी समान। नावानिगें[6] वीरसैन्य। युद्धा जावोनि प्रहस्त प्रधान। काय आंगवण तेणें केली॥३६॥ रणीं एकही वानरगण। प्रहस्तें न मारितांचि जाण। वानरीं त्याचा घेतला प्राण। सैन्य संपूर्ण मारूनी॥३७॥ प्रहस्ताची ऐसी गती। धूम्राक्ष रणगर्वार्थी। नित्य कुंथे रणोन्मत्तीं। तोही कपिहस्तीं निमाला॥३८॥ महाकाय महामाये। रणप्रवीण उभवोनि बाहे। लागतां वारनघायें। आक्रंदें पाहें निमाले॥३९॥ ज्याचेनि बळें दशानन। कळिकाळा न गणी आपण। वीर दुर्धर अकंपन। रिपुभंजन रणमर्दी॥४०॥ तोही वानरीं युद्ध करितां। मारिला पाणी न मागतां। विजय घेवोनि लंकानाथा। कोणी मागुता न येचि॥४१॥ हे तंव वीर अति दारुण। युद्ध करितां अतिसत्राण[7]। नुठतां राम लक्ष्मण। वानरींच जाण मारिले॥४२॥ वानरीं मारिले वीर सप्राण। अवघे राक्षस करितां रण। एकही न मरेचि वानरगण। राम रक्षण वानरां॥४३॥ रणीं राक्षस निःशेष मरती। एकही न मरे कपिपती। श्रीराम पूर्ण अवतारमूर्ती। वानरार्थी रक्षिता॥४४॥

रक्ष्यमाणास्तु रामेण सुग्रीवेण च पालिताः। तत्र ते रोचतां संधिः सह रामेण रावण॥१८॥
तस्य देवर्षयः सर्वे गन्धर्वाश्च जयैषिणः। विरोधं मा गमस्तेन संधिस्ते तेन रोचताम्॥१९॥
रामभार्या सती ह्येषा रामाय प्रतिदयिताम्। बिभीषणेन चैवोक्तं पूर्वमिव महात्मना॥२०॥
गतस्तत्रैव रामश्च तद्वचोयं करिष्यति॥२१॥

वानरांसीं करावया सळ[8]। राक्षसांमाजी नाहीं बळ। कपि मारिती राक्षसदळ। संग्रामी प्रबळ भिडोनी॥४५॥ रणीं निमतां निशाचर। एकही न मरेचि वानर। कपिरक्षिता रामचंद्र। पूर्ण अवतार परब्रह्म॥४६॥ सुग्रीव पाळी वानरभार। सुग्रीवा पाळी श्रीरामचंद्र। श्रीरामबळें वानर। अजरामर निजविजयी॥४७॥ ज्याचेनि विजयी वानर। त्यासीं करावें नित्य मित्र। सखा करावा श्रीरामचंद्र। सीता सुंदर अर्पूनी॥४८॥ तेथें आहे बिभीषण। तो संधि करील

शब्दार्थ : १. शंकराचे धनुष्य, २. इच्छेने, ३. नाश, ४. पायी चालणारा, ५. मैत्री, ६. नामांकित, ७. अती नेटाने, ८. वैर.

संपूर्ण। सीता देवोनि आपण। रिघावें शरण श्रीरामा।।४९।। श्रीरामा रिघाल्या शरण। सकळ कुळासी कल्याण। तुमचें चुकले मरण। कुंभकर्ण वांचेल।।५०।।

तस्यास्तु वचनं श्रुत्वा प्रियाया राक्षसेश्वरः। उष्णं दीर्घं च निःश्वस्य च निरीक्ष्य समासदान्।।२२।।
त्वया हि हितकांक्षिण्या वचो यद्बहुभाषितम्। न तन्मनसि मे देवि यत्प्रयोक्तं वै प्रियं प्रिये।।२३।।
देवाञ्जित्वा रणे पूर्वं ससुरासुरमानवान्। प्रणमे मानुषं कस्माद्वानरान्यः समाश्रितः।।२४।।
हस्ते मन्दोदरीं गृह्य वाचमेतदुवाचह। न तु संधिं करिष्यामि राघवेण सहैव तु।।२५।।
वैदेहीं नार्पयिष्यामि न करिष्यामि संनतिम्।।२६।।

मंदोदरीला रावणाचे निर्वाणीचे उत्तर : ऐकोनि मंदोदरीचें वचन। रावणासी पडिले मौन। उगाचि राहिला आपण। अति उद्विग्न अनुतापी।।५१।। जिंतले सुरासुर दानव। पादाक्रांत केले विश्व[1]। राम जाणे रणलाघव[2]। तरी राघव वंदींना।।५२।। निधडा नव्हे श्रीरघुनाथ केवळ वानरांचा आश्राइत। त्यासी मी वंदी लंकानाथ। तरी जगांत जघन्य[3]।।५३।। रणीं जातांही माझा प्राण। सीता देवोनि आपण। श्रीरामासी न रिघें शरण। सत्य भाषण हें माझें।।५४।। मंदोदरी धरोनि हातीं। रावणें नेली एकांतीं। जीवींची जे निजगृह्योक्ती। स्वयें तीप्रति सांगत।।५५।। शरण रिघा म्हणे बिभीषण। तैसेंचि सांगत कुंभकर्ण। आणीकही बहुसाल जन। रिघावें शरण तूं म्हणसी।।५६।। मी कां नायकें आपण। तेही अर्थीचें कारण। तें तूं ऐक सावधान। माझें ज्ञान हृदयस्थ।।५७।। म्यां अभिलाषिली सीता सती। अन्यत्र मरण नरकप्राप्ती। श्रीरामहस्तें अंतगती। सायुज्यमुक्ति सहजचि।।५८।। लागोनि श्रीरामाचा बाण। रणीं माझा गेलिया प्राण। तेव्हांच मी ब्रह्म पूर्ण। जन्म मरण मग कैचें।।५९।। पंचवटी रामासंमुख जातां। मीच पावतों सहुज्यता[4]। सकळकुळउद्धारणार्था। आणिली सीता चोरोनी।।६०।। अंती राम राम स्मरता। रंक पावे सायुज्यता। श्रीरामहस्तें स्वयें मरतां। ब्रह्मपूर्णता पावेन।।६१।। लागोनि श्रीरामाचा बाण। जों माझा जाय प्राण। तों सीता न सोडीं आपण। सत्य भाषण हें माझें।। ६२।। लागतां श्रीरामाचा बाण। माझ्या जन्ममरणासी ये मरण। मी होईन ब्रह्म परिपूर्ण। हे मज ज्ञान नारदोक्तें।।६३।। यालागीं श्रीरामा न रिघें शरण। न वंदी श्रीरामाचे चरण। यालागीं संदेह[5] न मानीं जाण। नारदवचनविश्वासें।।६४।। जरीं तूं पतिव्रिता लाठी[6]। तरी हे माझी गुह्य गोष्टीं। कोठें न वदावी वाक्पुटीं। राखावी पोटीं अति गृह्य।।६५।। एका जनार्दना शरण। मंदोदरी सुखसंपन्न। वंदोनि रावणाचे चरण। निघे आपण निजधामा।।६६।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणमंदोदरीसंवादो नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः।।२३।। ओव्यां।।६६।। श्लोक ।।२६।। एवं ।।९२।।

## अध्याय चोविसावा

।।। श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### नारद - रावण संवाद

मंदोदरीच्या भवनात धर्मऋषींचे आमगन : श्रीरामपदांबुजीं[7] नित्य न्हातां। श्रीरामकीर्ती अखंड गातां। श्रीरामरूपीं मन वसतां। श्रीरामता उन्मनेंसीं।।१।। मंदोदरीचिया भवनासी।

शब्दार्थ : १. सर्व सृष्टी, २. युद्धकुशलता, ३. निंद्यता, कमीपणा, ४. चौथी मुक्ती, ५. संशय, ६. मोठी, ७. श्रीरामाच्या पदकमली.

स्वभावें आला धर्मऋषी। तिणें पुजोनियां त्यासी। अत्यादरेंसी पूसिलें।।२।। नारदमुनींच्या वचनासी। परम विश्वास रावणासीं। हे पूर्व कथा जाली कैसी। विदित तुम्हांसी तरी सांगा।।३।।

मंदोदरीच्या प्रश्नाला धर्मऋषींचे उत्तर : ऋषि म्हणे मी स्वधर्मता। जाणें भूतभविष्यार्था। तुझ्या प्रश्नाची निजकथा। सावधानता अवधारीं।।४।। पूर्वी भेटी सनत्कुमारांसी। त्यांच्या वचनार्था श्रद्धेसीं । तेंचि पुसतां नारदापासीं । आला विश्वासी परमार्थी।।५।। परी विरोधें घ्यावी मुक्ती। हेचि आवडी रावणाचे चित्तीं। विरोध करावयाची स्थिती। ऐक तुजप्रती सांगेन।।६।।

> पुरा कृतयुगे नाम प्रजापतिसुत प्रभुम्। सनत्कुमारमासीनं रावणो राक्षसाधिपः।।१।।
> सदृशं सूर्यसंकाशं ज्वलंतमिव तेजता। विनयावनतो भूत्वा ह्यभिवाद्य कृतांजलिः।।२।।
> उक्तवान्रावणो राजा तमृर्षि सत्यवादिनम् । को ह्यस्मिन्प्रवरे लोके देवानां बलवत्तरः।।३।।
> यं समाश्रित्य विबुधा जयंति समरे रिपून्। कं जयंति द्विजा नित्यं कं ध्यायंति च योगिनः ।।४।।
> एतन्मे शंस भगवन्विस्तरेण तपोधन।।५।।

सनत्कुमार व रावणाची भेट रावणाचा प्रश्न : रावण बैसोनि विमानीं। स्वभावें जातां गगनीं। सनत्कुमार देखिले नयनीं। देदीप्यमान तेजस्वी।।७।। जयांचिया अंगप्रभा। रविसोमांची हरिली आभा[1]। रात्रिदिवसांची लोपली शोभा। सच्चिद्राभा तेजस्वी।।८।। ऐसे ते तेजस्वी सदोदित। ब्रह्मयाचे मानससुत। रावणें देखिले अकस्मात। जाला विस्मित मानसीं।।९।। कृतयुगाचे परम प्रांतीं[2]। सनत्कुमार तेजोमूर्ती। ते भेटले लंकापती। ऐक उपपत्ती तयांची।।१०।। श्रद्धायुक्त स्वयें रावण। घालोनियां लोटांगण। मस्तकीं वंदोनियां चरण। विनीत[3] प्रश्न पूसत।।११।। ब्रह्मयाचा नातू आपण। माझें नांव पैं रावण। कृपा करोनि संपूर्ण। पुसतों प्रश्न सांगावा।।१२।। द्विज कोणाचें करिती यजन। योगी कोणाचें धरिती ध्यान। भक्त कोणाचें करिती भजन। तुम्हांसी चिंतन कोणाचें।।१३।। कोणाचें बळें देवगण। रणीं करिती रिपुदळन। ऐसा बलवत्तर कोण। कृपा करून सांगावें।।१४।। तुमचे गांठी तपोधन। भगवद्भाव सनातन। त्याचे श्रेष्ठ महिमान। चरणां शरण सुरश्रेष्ठ।।१५।। शिव विष्णु शक्र[4] ब्रह्मा। त्रिपदा गायत्री उमा[5] रमा। चरणा शरण येती तुम्हां। तपाचा महिमा अगाध।।१६।। तपोधना भीती सुरासुर। तपोधना भीती यक्ष किन्नर। तपोधना देखोनि समोर। स्वयें हरिहर वंदिती।।१७।।

> विदित्वा हृद्गतं तस्य ध्यानदृष्टिर्महायशाः। उवाच रावणं प्रेक्ष्य श्रूयतामिति पुत्रक।।६।।
> यो वै भर्ता जकत्कृत्स्नं यस्योत्पत्तिं न विद्महे । सुरासुरैर्नतो नित्यं हरिर्नारायणः प्रभुः।।७।।
> येन सर्वमिदं सृष्टं विश्वं स्थावरजंगमम् । तं समाश्रित्यं विबुधा विधिना हरिमध्वरे।।८।।
> पिबंति ह्यमृतं चैव मानवाश्च यजन्ति तम्। ध्यायंति योगिनी नित्यं क्रतुमिश्च यजन्ति तम्।।९।।
> दैत्यदानवरक्षांसि ये चान्ये वामरद्विषः। सर्वान्जयति संग्रामे सदा सर्वैः सुपूज्यते।।१०।।

श्री विष्णूंच्या भक्तांना अपयश येत नाही असे धर्मऋषींचे उत्तर : रावणाचें मनोगत। ध्यानदृष्टीं समस्त। जाणोनियां ते संत। मग सांगत प्रश्नातें।।१८।। नाहीं आदि मध्य निधन[6]। जो सदोदित सनातन[7]। तो स्वामी श्रीनारायण। ज्यासी त्रिभुवन सदा वश्य।।१९।। ज्यासी वंदिती सुरासुरगण[8]। ज्याचें योगी करिती ध्यान। यज्ञीं यजिती ज्या ब्राह्मण। तो स्वामी नारायण सर्वांचा।।२०।। जो विश्व स्रजी[9] संपूर्ण। जो अंगें विश्व आपण। ज्याचेनि बळें सुरगण। अमृतपान करिताती।।२१।। ज्याचिया गा निजस्थितीं। तिळभरी वाट नाहीं रिती। जो

शब्दार्थ : १. कांती, २. शेवटी, ३. नम्र होऊन, ४. इंद्र, ५. पार्वती, ६. अंत, मृत्यू, ७. अनादिसिद्ध, ८. देवांचे आणि राक्षसांचे समुदाय, ९. निर्माण करतो.

कोंदलासे त्रिजगतीं। जो सर्वां भूतीं सबाहा[1] ॥२२॥ ऐसा जो कां जगत्स्वामीं। जो कां वंद्य आगमनिगमीं[2]। ज्याचेनि बळें सुरोत्तमीं। रिपु संग्रामी निर्दळिले ॥२३॥ ज्याचेनि आश्रयें नर। यक्ष राक्षस किन्नर[3]। रणीं जिंकिती सुरासुर। तो स्वामी साचार स्वयें विष्णु ॥२४॥ नामीं रत जे पुरुष। ते स्वप्नी न देखती अपेश। त्रिभुवनीं न माये यश। हृषीकेश निजस्वामी ॥२५॥ इंद्रियां प्रेरिता वारिता। ऐसी ज्याची निजसत्ता। हृषीकेश तो तत्वतां। साह्य निजभक्तां सर्वार्थी[4] ॥२६॥ जनीं जनार्दन निजीं निज। जनीं जनार्दन सहजीं सहज। जनीं जनार्दन भजनीं भज्य। सर्वार्थी पूज्य जनार्दन ॥२७॥ ऐकोनि ऋषीचे वचन। विनीत अति प्रीती प्रश्न। स्वयें पुसत रावण। वंदून चरण ऋषीचे ॥२८॥

श्रुत्वा महेर्षेस्तद्वाक्यं रावणो राक्षसाधिपः। उवाच प्रणतो भूत्वा पुनरेव महामुनिम् ॥११॥
दैत्यदानवरक्षांसि ये हताः समरे सुराः। कां गतिं प्रतिपद्यंते किंवा ते हरिणा हताः ॥१२॥
रावणस्य वचः श्रुत्वा प्रत्युवाच महामुनिः। दैवतैर्निहता नित्यं प्राप्नुवंति नभस्तलम् ॥१३॥
पुनस्तस्मात्परिभ्रष्टा जायंते वसुधातले। पूर्वार्जितैश्च सुकृतैर्जायंते च म्रियंति च ॥१४॥
ये ये हताश्चक्रधरेण राजन्त्रैलोक्यनाथेन जनार्दनेन।
ते ते गतास्तन्निलयं नरेंद्र क्रोधापि देवस्य वरेण तुल्यः ॥

**सायुज्यमुक्ती मिळेल असा देव कोणता : असा रावणाचा प्रश्न :** परम श्रद्धा अति प्रीतीं। रावण पुसे मुनीप्रती। सुरसुरांते मारिती। त्यांसी कोण गती मज सांगा ॥२९॥ जे कां श्रीविष्णूच्या हातीं। निधडे वीर रणीं पडती। त्यांसी होय कोण गती । तेंही मजप्रती सांगावें ॥३०॥

**रावणाच्या प्रश्नाला सनत्कुमारांचे उत्तर :** ऐकोनि रावणाचा प्रश्न। सनत्कुमार स्वयें आपण। सांगे ते गतींचे लक्षण। सावधान अवधारा ॥३१॥ सुरवरहस्तें जे मरती। त्यांसी स्वर्गपंथ ऊर्ध्वगती। क्षीणपुण्यें तेथोनि रिचवती[5]। माघारे येती गर्भवासा ॥३२॥ गर्भवासाचें सांकडें। अतिशयेंसीं दुःख गाढें। रावणा तें मी सांगेन तुजपुढें। निजनिवाडें अवधारी ॥३३॥ केवळ रजस्वलेचें रुधिर। माजी पित्याचें रेत मात्र। तें हें विटाळाचें शरीर। अपवित्र निंद्यत्वें ॥३४॥ मातेचिया उदरकुहरीं[6]। विष्ठामूत्रांचे दाथरावरी[7]। जठराग्नीमाझारीं। नवमासवरी उकाडा ॥३५॥ गर्भवासाचें दुःख गाढें। विष्ठालेप[8] चहूंकडे। नाकीं तोंडीं रिघती किडे। कोणापुढें सांगेल ॥३६॥ देखोनि गर्भींची आटक[9]। जीव अनुतापें करी शंख। विषयसुखगर्भींचें दुःख। आक्रंदें हाक स्वयें मारी ॥३७॥ विषयांपासीं जन्ममरण। विषयें गर्भदुःख दारुण। विषयसुख ते नागवण[10]। विषय ते जाण महा मैंद[11] ॥३८॥ विषय देहदरीचा वाघ। विषय विश्वासी मारक मांग। विषय तोचि सर्वांगदाघ[12]। विषय सांग महावैरी ॥३९॥ गर्भवासापुढें देख। अंधतामिस्र महानरक। ते तंव बापुडे मशक। परमदुःख गर्भवासीं ॥४०॥ जे देवांचेनि हाते मरती। ते ते पडती दुःखावर्ती। स्वर्गसंसारआवर्तीं। जन्म भोगिती अविश्रम ॥४१॥ विष्णूचे हातें जे जे मरती। तयां सद्यः ब्रह्मप्राप्ती। सायुज्यादि चारी मुक्ती। शरण येती तयांतें ॥४२॥ चक्रधर जो जनार्दन। त्याचेनि हातें सभाग्य मरण। अभाग्या नाठवे नामस्मरण। मग दर्शन तें कैंचें ॥४३॥ क्रोध आणि सुप्रसन्न। विष्णूच्या ठायीं दोनी समान। भक्ता आणि वैरिया जाण। समान दान ब्रह्मसायुज्य ॥४४॥ ऐकोनि ऐसें रावण। अतिशयें विस्मयापन्न। अति श्रद्धें उल्लासोन। पुढती प्रश्न पुसत ॥४५॥

श्रुत्वा ततस्तद्वचनं निशाचरः। सनत्कुमारस्य मुखाद्विनिर्गतम् ॥

---

शब्दार्थ : १. आत आणि बाहेर, २. वेदशास्त्रांमध्ये, ३. गंधर्व, ४. सर्व कार्यांत, ५. पडतात, ६. उदररूपी गुहेत, ७. उकाड्यांत, ८. नरकाची लिंपण, ९. अडथळा, प्रतिबंध, १०. फसवणूक, ११. अती दुष्ट, १२. सर्वांगास जाळणारा अग्नी.

तथा प्रहृष्टः स बभूव विस्मितः। कथं नु यास्यामि हरिं महाहवे॥१६॥
एवं चिंतयतस्तस्य रावणस्य दुरात्मनः। पुनरेवापरं वाक्यं व्याजहार महामुनिः॥१७॥
मनश्चोत्कंठितं यत्ते भविष्यति तदाहवे। सुखी भव महाबाहो कंचित्कालमुदीक्षय॥१८॥

श्री विष्णूंच्या हातून मुक्ती मिळते हे ऐकून रावणास संतोष : विष्णूचेनि हातें मरण। तें ब्रह्मसायुज्य[1] कृतकल्याण। मुनिमुखें ऐकोनि रावण। सुखसंपन्न स्वयें जाला॥४६॥ ऐसा सभाग्य काळ कोण। मज विष्णूसीं घडे रण। विष्णुहस्तें जाय माझा प्राण। स्वयें रावण हेंचि वांच्छी॥४७॥ श्री विष्णुसीं करितां रण। केव्हां जाईल माझा प्राण। हेंचि वांच्छी स्वयें रावण। आवडी गहन[2] युद्धाची॥४८॥ श्रीविष्णूसीं महारण। स्वयें पावेल रावण। ऐसें बोलिले मुनिगण। तेथें विलंबन काळाचें॥४९॥ यथाकाळें पावे रण। तंव प्रतीक्षा[3] करावी[3] आपण। पुढें युद्ध अति दारुण। अलोट जाण होईल॥५०॥ जैसें तुझे मनोगत। तैसें युद्ध करील रघुनाथ। हें ऐकोनि लंकानाथ। उल्लासित स्वयें जाला॥५१॥ करोनियां प्रदक्षिणा। लागोनि मुनीच्या चरणा। रावण निघे ब्रह्मसदना। मुनी अनुष्ठाना स्वयें गेले ॥५२॥ श्री विष्णुसीं महारण। कैं मी देखेन आपण। ऐसें अहोरात्र जाण। करी ध्यान युद्धार्थी॥५३॥

ब्रह्मलोकान्निवर्ततं समासाद्य ममुनिम्। उवाच हृष्टमनसा नारदं रावणस्तदा॥१९॥
आब्रह्मभुवनाल्लोकास्त्वया दृष्टा ह्यनेकशः। कस्मिंल्लोके महाभाग मानवा बलवत्तरा :॥२०॥
तान्ममाख्याहि धर्मज्ञ पिता मे त्वं हि धर्मतः। चिंतायित्वा मुहूर्तं तु नारदः प्रत्युवाच तम्॥२१॥
श्रूयतां सर्वमाख्यास्ये तव राक्षसपुंगव॥२२॥

नारद ब्रह्मभवनाकडून येत असता रावणाची भेट : ब्रह्मभवनाहूनि[4] रावण। परतोनि येतां आपण। झालें नारदाचें दर्शन। तेणें दशानन आल्हादी॥५४॥ रावण म्हणे मी सफळितार्थ[5]। नारदमुनि भेटला येथ। याचेनि माझे मनोरथ। कृतकृत्यार्थ मुनिवाक्यें॥५५॥ ऐसें बोलोनि आपण। रावण घाली लोटांगण। वंदोनि नारदाचे चरण। आदरें प्रश्न पूसत॥५६॥

ब्रह्मभुवनलोकात युद्ध करण्यास समर्थ कोण ? असा नारदाला रावणाचा प्रश्न : आब्रह्मभुवन लोक। स्वामींनीं देखिले अशेख[6]। मजसीं युद्ध करावया देख। बळी पुरुष आहे कोणी॥५७॥ माझिया भुजांचें त्राण। पुरे ऐसें करावया रण। सृष्टीमाजी बळिया कोण। त्याचें लक्षण मज सांगा॥५८॥ त्याची कैसी कैसी स्थिती। त्याची कैसी कैसी गती। त्याची अवयव आकृती। यथानिगुतीं मज सांगा॥५९॥ ऐसा रावणें पुसतां प्रश्न। नारद अंतर्यामीं आपण। जाणोनि हृदयस्थ संपूर्ण। त्याचेंचि लक्षण अनुवादे॥६०॥ रावणा आवडी तुझी पूर्ण। मुख्य देवासीं करावें रण। त्याचें द्विविध[7] लक्षण। सगुणनिर्गुण-विभागें॥६१॥ सगुण निर्गुण विभागोन। तें मी सांगेन विवंचून। रावणा ऐक सावधान। कृतकल्याण पावावया॥६२॥

स हि सर्वगतो देवः सूक्ष्मोऽव्यक्तः सनातनः। तेन सर्वमिदं व्याप्तं त्रैलोक्यं सचराचरम्॥२३॥
अहश्च रात्रिश्च उभे च संध्ये दिवाकरश्चैव यमश्च सोमः।
स एव कालो ह्यनिलोऽनलश्च स एव सर्व । ॐकारश्चैव सत्यं च सावित्री पृथिवी च सः।
धराधरधरो देवो ह्यनंत इति विश्रुतः॥२५॥

नारदाचे उत्तर : जेथोनि नाना अवतार। सबळ बळें उठती साचर। तें मुख्य स्वरूप निराकार।

शब्दार्थ : १. ईश्वराशी अभेद करणारी सायुज्य मुक्ती, २. मोठी, ३. वाट पाहावी, ४. ब्रह्मलोकाहून, ५. कृतकृत्य, ६. सर्व, ७. दोन प्रकाराचे.

निर्विकार तें ऐका ॥६३॥ भूतां सबाह्य भगवंत। कोंदला आहे सदोदित। अति सूक्ष्मत्वें नव्हे व्यक्त। जेंवी गुळांत गिजगोडी ॥६४॥ गुळा सबाह्य निखळ गोडी। तेथें गूळ हे वार्ता कुडी। तेंवी मिथ्या भूतपरवडी। चित्सत्ता[1] रोकडी सबाह्य नांदे ॥६५॥ जेंवी सूक्ष्म लक्षितां तंत। वस्त्रमात्र मिथ्या मात। तेंवी लक्षितां भगवंत। प्रपंच व्यर्थ मिथ्यात्वें ॥६६॥ दोराअंगीं सर्पत्व नसे। नसताचि सर्प भ्रांतांसी भासे। तेंवी भगवंती प्रपंच नसे। मिथ्या आभासे मूर्खासी ॥६७॥ स्वरूप लक्षितां साचार। मिथ्या ब्रह्मा विष्णु शिव शक्र। तेथें कैंचे गा चराचर। वस्तु चिन्मात्र सदोदित ॥६८॥ नाहीं आकारविकारविलास। नाहीं आयुष्य मग कैंचा नाश। यालागी अव्यय अविनाश। म्हणती परेश[2] परमात्मा[3] ॥६९॥ तेथें नाहीं अहोरात्र। नाही नक्षत्रें रवि चंद्र। नाहीं वरुणादि यम कुबेर। काळ दुर्धर तेथें मिथ्या ॥७०॥ ऐसी वस्तु जे अविनाशी। तेचि कोंदलीसे जगासीं। तिचेनि गति इन्द्रियांसी। तिचेनि प्राणांसी प्राणत्व ॥७१॥ तिचेनि प्रकाशें अहोरात्र। तिचेनि तपती रवि चंद्र। तिचेनि पंचभूतें साचार। चराचर तिणें अति व्याप्त ॥७२॥ तिचेनि ओंकार आपण। तिचेनि सत्या सत्यपण। तिचेनि गायत्री पावन। वंद्य ब्राह्मण तेणें तेजें ॥७३॥ ब्रह्मा विष्णु शंकर। हेहीं वस्तूचे गुणावतार वस्तु निर्गुण निर्विकार। चराचर व्यापूनि ॥७४॥ उभें आडवें विणून सूत। त्या नांव पैं वस्त्र म्हणत । तेंवी व्यापक भगवंत। त्यासीच म्हणत प्रपंच ॥७५॥ तोचि धरा[4] तोचि धराधर[5]। तोचि विश्व तोचि विश्वाधार। तोचि भूत भूतात्मा साचार । त्यासी संसार मानिती मूर्ख ॥७६॥

नारदाच्या उत्तराने रावणाला उद्विग्नता : ऐकोनि नारदांचें वचन। रावण झाला अति उद्विग्न। पुढती करोनियां नमन। काय आपण पूसत ॥७७॥ रूप सांगितलें निर्गुण। त्यासी करितां नये रण। माझ्या भुजांचें पुरे त्राण[6]। तैसा संपूर्ण बळी सांग ॥७८॥ नारद म्हणे दशानन। तुजसीं करावया रण। देव दानव मानव जाण। नाहीं आंगवण ये समयीं ॥७९॥ मज पाहतां लोक तीन्हीं। युद्ध करावया तुझे ठायीं। बळिया न दिसे ये समयीं। सत्य पाहीं लंकेशा ॥८०॥ रावण अनुवादे आपण। दिग्विजयो करितां जाण। नाहीं योद्धा मजसमान। हेंही संपूर्ण मी जाणें ॥८१॥ मजसीं करावया रण । थोरल्या देवासी आंगवण। इतर योद्धे मजपुढें तृण। त्याचें लक्षण मज सांग ॥८२॥ थोरल्या देवासी आंगवण। तो कां न ये करावया रण। तोही लपतो मज भेण। त्याचें भेडपण दिसताहे ॥८३॥

नारदाचा रावणाला प्रश्न : ऐसें बोलतां दशानन। नारद विस्मयें हास्यवदन। मुख्य देवासीं करावया रण। काय कारण तें सांग ॥८४॥ देवांशी करितां रण। निमाल्या न सोडी जन्ममरण। मुख्य देवें वधिल्या जाण। ब्रह्मत्व परिपूर्ण अवाप्त[7] ॥८५॥ हेही मजलागीं निजखूण। सनकादिकीं सांगितली जाण। यालागीं मुख्य देवासीं रण। करावया मन उद्यत ॥८६॥ ऐकोनि रावणाची उक्ती[8]। नारद संतोषला चित्तीं। जेणें पावे ब्रह्मप्राप्ती। ते श्रीराम मूर्ती स्वयें सांगे ॥८७॥

नीलोत्पलदलश्याम: किंजल्कारुणवासस:। प्रावृट्काले यथा व्योम्नि सतडित्तोय-दस्तथा ॥२६॥
श्रीमान्मेघवपुश्याम: शुभपंकजलोचन:। श्रीवत्सेनोरसा युक्त: शशांककृतलक्षण: ॥२७॥

योग्यकाली योद्धा येईलच असे नारद रावणाला सांगतात : नीलोत्पलदलश्याम[9]। राजीवलोचन

---

शब्दार्थ : १. परब्रह्म, २. परा-माया तिचा ईश म्हणजे स्वामी, ३. सर्वव्यापी आत्मा, ४. पृथ्वी, ५. पृथ्वी धारण करणारा दोष, ६. सामर्थ्य, ७. प्राप्त, ८. भाषण, ९. नील कमलदलाप्रमाणे काळसर.

श्रीराम। ज्याचिया श्यामता लोपलें व्योम। घनश्याम श्रीराममूर्ति ॥८८॥ श्रीरामश्यामता संपूर्ण। मेघश्यामता त्यापुढें तृण। ज्याची श्यामता देखिल्या जाण। सुखसंपन्न सबाह्य ॥८९॥ नेत्रोपम कमळदळें। तीं तंव नश्वर तत्काळें। श्रीरामाचे देखणे डोळे। सर्वकाळ सद्रूप ॥९०॥ विजू घालोनियां पुटीं। सबाह्य शोधिली गोमटी। तैसा पीतांबर माळगाठीं। शोभे परवंटी[1] श्रीरामा ॥९१॥ श्रीरामकांसे लागोनि जाण। विजु विसरली अस्तमान। दिव्य तेजें विराजमान। सर्वदा जाण लखलखीत ॥९२॥ मुकुट कुंडलें मेखळा। कांसे कसिला सोनसळा[2]। कंठीं मनोहर माळा। तुळसीदळासमयुक्त ॥९३॥ बाहुअंगदें रत्नभूषणें। करमुद्रिका करकंकणें। श्रीराम लेणियांचे[3] लेणें। कैसा कवणें वानावा ॥९४॥ लक्ष्मी डावलोनि[4] संपूर्ण। दक्षिणांगीं विप्रचरण। शोभे श्रीवत्सलांछन। शशांकचिन्ह जेंवी नभीं ॥९५॥ श्रीरामपदसामुद्रिका। चतुर्मुखा पंचमुखा। न वर्णवे षण्मुखा। सहस्रमुखा निजमौन ॥९६॥ वांकीअंदुवांचा गरज। चरणीं गर्जती तोडर। बळियां बळी श्रीरामचंद्र। सुरासुर कांपती ॥९७॥ मांडून माहेश्वरी ठाण। सज्जूनियां धनुष्यबाण। श्रीरामासीं करावया रण। संमुख कोण राहिला ॥९८॥ श्रीरामासीं करावया रण। बापुडें कायसें रावण। एके बाणें घेईल प्राण। सत्य जाण लंकेशा ॥९९॥ ऐकोनियां नारदाची मात। रावण आल्हादें नाचत। श्रीरामासीं युद्धकंदनार्थ। कोण्या काळीं होईल ॥१००॥ युद्धीं तगटे श्रीरामचंद्र। तें युद्ध व्हावें अति शीघ्र। ऐस पुसतां निशाचर। मुनीश्वर सांगत ॥१॥ भूत भविष्य वर्तमान। नारदासीं नित्यज्ञान। श्रीरामाचें समूळ कथन। स्वयें आपण सांगत ॥२॥ श्रीरामाचें निजलक्षण। नारद सांगे संतोषोन। सावध ऐकें दशानन। युद्धकारण लक्षूनी ॥३॥

कृते युगे व्यतीते तु मुखे त्रेतायुगस्य च। हितार्थं देवमर्त्यानां भविता नृपविग्रहः ॥२८॥
इक्ष्वाकूणां कुले राजा भाव्यो दशरथो भुव। तस्य सूनुर्महातेजा रामो नाम भविष्यति ॥२९॥
महातेजा महाबुद्धिर्महाबलपराक्रमः। महाबाहुर्महासत्वः क्षमया पृथिवीसमः ॥३०॥
आदित्य इव दुष्प्रेक्ष्यः समरे शत्रुभिः सदा। भविता हि तदा रामो नरो नरायाणः प्रभुः ॥३१॥

**श्रीरामांचे निजलक्षण नारदाकडून रावण ऐकतो :** कृतयुगाचा होतां प्रांत[5]। त्रेतायुगाचे प्रारंभांत। होईल राजा दशरथ। त्याचा सुत श्रीराम ॥४॥ देव स्थापावया निजपदीं। भक्तां द्यावया मोक्षसिद्धी। मनुष्य लावावया सुबुद्धी। श्रीराम त्रिशुद्धी अवतार ॥५॥ सूर्यवंशी वंशभूषण। ककुत्स्थकुळीं उत्पन्न। अवतार श्रीरघुनंदन। चैतन्यघनविग्रही[6] ॥६॥ जे आदिकारणा कारण। ज्यासी श्रुती म्हणती नारायण। तेंचि श्रीरामस्वरूप जाण। स्वामी संपूर्ण सर्वांचा ॥७॥ ज्याचेनि तेजःप्रतापें। चंद्रसूर्यांची प्रभा लोपे। आकाश शून्यत्वें हरपे। श्रीरामदीपें निजतेजें ॥८॥ धन्य श्रीरामाची निजबुद्धी। वैरिया दे सायुज्यसिद्धी। वोखटे[7] करूं नेणे त्रिशुद्धी। बुद्धीची सुबुद्धी श्रीराम ॥९॥ श्रीराम बळाचिये सिद्धी। समूळ छेदी देहबुद्धी। मीतूंपणाचिये विधी। स्वयें त्रिशुद्धी निर्दळी ॥११०॥ आजानुबाहु श्रीरघुनाथ। द्वैतदळणीं निजपुरुषार्थ। भवभीता अभयहस्त। रक्षी निजभक्त वरदहस्तें ॥११॥ अगाध श्रीरामाचें सत्व। जग जन्ममरण विकाररहित। सकळ विश्व प्रतिपाळीत। न करितां घात निर्दळी ॥१२॥ श्रीरामशांतीची नवलपरी। अपकार साहोनि अंगावरी। अपकारिया होय उपकारी। अगाध थोरी शांतीची ॥१३॥ ऐसिया श्रीरामशांतस्थितीं। साहोनि भूतांची उद्धती[8]। पृथिवीस आली परम शांती। सहजस्थिती निजशांती ॥१४॥ मध्यान्हकाळींच्या सूर्यापुढें। पाहतां दृष्टीं अंधार पडे। तेंवी संग्रामीं श्रीरामापुढें। कोण बापुडें राहील ॥१५॥ देखतां

---

**शब्दार्थ :** १. नेसणे, २. पीतांबर, ३. अलंकाराचे, ४. दूर सारून, ५. शेवट, ६. चैतन्यरूपी देह धारण करणारा, ७. वाईट, ८. अविनयता, दांडगाई.

श्रीरामाचे बाण। धाकेचि वीरांचें जाती प्राण। त्यासीं संमुख करावया रण। राहे कोण संग्रामी ॥१६॥ श्रीरामस्वरूपदर्शन। सहसा पावों शके कोण। तेही विषयींचे निरुपण। सावधान अवधारीं ॥१७॥

न शक्यते सुरैर्द्रष्टुं नासुरैर्न च पन्नगैः। यस्य प्रसादं कुरुते स वै तं द्रष्टमर्हति ॥३२॥
न हि यज्ञफलैस्तात न तपोभिश्च संचितैः। शक्यते भगवान्द्रष्टुं न दानेन न चेज्यया ॥३३॥

**श्रीरामांच्या दर्शनप्राप्तीचे मार्ग नारद रावणाला सांगतात :** ज्यासीं श्रीराम सुप्रसन्न। त्यासीच भेटे रघुनंदन। इतरांचें ज्ञान ध्यान। तृणासमान श्रेष्ठत्व ॥१८॥ हृदयीं वैराग्य संपूर्ण। त्यांना राम सुप्रसन्न। वैराग्यवीण ज्ञान ध्यान। तृणासमान श्रेष्ठत्व ॥१९॥ देखावया श्रीराममूर्ती। सुरवरांची न चले शक्ती। असुरपन्नगादि सिद्धपंक्ती। त्यांसीही रघुपति दुष्प्रेक्ष्य[१] ॥२०॥ तपस्वी तपोयुक्तीं। संचिती देहें तप:संपत्ती। तपाची स्वर्गावरी गती। त्यांसी रघुपति भेटेना ॥२१॥ करूनियां पशुहनन। यज्ञीं करिती यजन। तेथें हिंसेचें आयतन[२]। रघुनंदन न भेटे ॥२२॥ देतां नानाविध दान। दातेपणाचा अभिमान। दानफळही वांच्छित मन। तेथें रघुनंदन न भेटे ॥२२॥ देतां नानाविध दान। दातेपणाचा अभिमान। दानफळही वांच्छित मन। तेथें रघुनंदन न भेटे ॥२३॥ यज्ञ दानतप:संपत्ती। याची योगा सामर्थ्यशक्ती। श्रीरामाची नव्हे प्राप्ती। जाण निश्चितीं लंकेशा ॥२४॥ पावावया श्रीरामप्राप्ती। दृढ वैर कां अनन्य भक्ती। येणें पाविजे रघुपती। जाण निश्चितीं लंकेशा ॥२५॥ अनन्य भक्तीचें लक्षण। पहिलें सांगेन परिपूर्ण। पाठीं वैराचें कारण। केल्या निर्वाण[३] ते साधे ॥२६॥

तद्भक्तैस्तद्गतप्राणैस्तच्चितैस्तत्पराणैः। शक्यते भगवान्द्रष्टुं ज्ञाननिर्दग्धकिल्बिषैः ॥३४॥
अथवा पृच्छ राजेंद्र यदि तं द्रष्टुमिच्छसि। कथयिष्यामि ते सर्वं श्रूयतां यदि रोचते ॥३५॥

**स्त्रीहरण केल्याने वैर उत्पन्न होते :** सांडोनियां प्रपंचसाधन। देह केला रामार्पण। श्वासोच्छवासीं श्रीरामसेवन। तद्गतप्राण या नांव ॥२७॥ सोहंहंसाच्या अनुवृत्ती[४]। ज्याच्या प्राणवृत्ती विचरती। तद्गतप्राण त्यातें म्हणती। हे योगस्थिति अति गुह्य ॥२८॥ सांडोनि प्रपंचचिंता। नित्य चिंतितां निजात्मता। चित्त रातलें[५] भगवंता। मच्चित्तता या नांव ॥२९॥ नाना चिंतेचे प्रबळ अर्थ। पुढें येवोनि झाल्या प्राप्त। चित्त विसरेना भगवंत। जाण मच्चित्त अहर्निशी[६] ॥३०॥ उत्तममध्यमाधमा भूतीं। भगवद्भाव[७] अहोरातीं। या नांवे मुख्य भगवद्भक्ती। स्वप्नसुषुप्तीं भगवंत ॥३१॥ जागृति स्वप्नसुषुप्तीं। ज्यांसी स्फुरेना देहस्फूर्ती। ऐशा चालीं वेदोक्तीं। जाण तो निश्चितीं मत्पर ॥३२॥ सद्गुरुवाक्य अति निपुण। जाणोनि देहाचे मिथ्यापण। मी आत्मा चिद्रूप परिपूर्ण। मत्परायण या नांव ॥३३॥ देहीं देहाचें नाहीं स्फुरण। वेदोक्त चालवी कर्माचरण। ज्यासीं नुठे आत्माभिमान। मत्परायण तो भक्त ॥३४॥ नित्य करितां भगवद्भजन। संकल्प विकल्प गेले विरोन। त्यासींच भेटे रघुनंदन। अनन्यभजन या नांव ॥३५॥ वैर करावया आवडी पूर्ण। अंगी असेल आंगवण। तरीच वैराचें पूर्ण कारण। सांग संपूर्ण सांगेन ॥३६॥ मुख्य वैरांचे कारण। करावें गादारहरण[८]। तेचि विषयींचें निरूपण। नारद आपण सांगत ॥३७॥

तस्य पत्नी महाभागा लक्ष्मी सीतेति विश्रुताः। दुहिता जनकस्यैषा प्रोत्थिता वसुधातलात् ॥३६॥
रूपेणाप्रतिमा लोके सर्वलक्षणलक्षिता। छायेवानुगता रामं निशाकरमिव प्रभा ॥३७॥
शीलाचारगुणोपेता साध्वी धैर्यसमन्विता ॥३८॥

**नारद सीतेचे स्वरूपलक्षण सांगतात :** त्या श्रीरामाची निजकांता। परम सुंदर पतिव्रता

---

**शब्दार्थ :** १. दिसण्यास कठिण, २.स्थान, ३. मोक्ष, ४. सतत ध्यानाने, ५. रमले, ६.रात्रंदिवस, ७. ईश्वरभावना, ८. स्त्रीहरण.

सीता। तिच्या स्वरूपासीं समता। नाहीं सर्वथा तिहीं लोकीं॥३८॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा। तृणप्राय यांची उपमा। खद्योतप्राय[1] उमा रमा। सीतेंसीं समा त्या नव्हती॥३९॥ रूपावेगळी नव्हे छाया। तेंवी सीता श्रीरामराया। वेगळी नव्हे कांहीं केलिया। अनुगत[2] तया अहर्निशीं॥१४०॥ जेंवी चंद्राची द्योतकता[3]। वेगळी न करवे सर्वथा। तेंवी श्रीरामावेगळी सीता। नव्हे तत्वतां निश्चित॥४१॥ ते जनकाची निजदुहिता। नित्यानुकूल श्रीरघुनाथा। शीलसाध्वी पतिव्रता। सती सीता निजसत्वें॥४२॥

एवं ते सर्वमाख्यातं मया रावण विस्तरात्। महते देवदेवस्य शाश्वतस्याव्ययस्य च॥३९॥

एवं श्रुत्वा महाबाहो राक्षसेन्द्र प्रतापवान्। त्वया सह विरोधेच्छुश्चिंतयामास राघवः॥४०॥

सावध करोनि रावण। नारद अनुवादे पैं आपण। श्रीरामाचें स्वरूपलक्षण। तुज म्यां संपूर्ण सांगितलें॥४३॥ सगुण आणि निर्गुण। दोहीं स्वरूपीं राम पूर्ण। हें म्यां सांगितलें विवंचून[4]। स्वरूपलक्षण सीतेचें॥४४॥ देवाधिदेव श्रीरघुनाथ। अजन्मा अव्यय अच्युत। त्याचा सांगितला वृत्तांत। समूळ साद्यंत लंकेशा॥४५॥ यावरी तुजला उचित। जो देखसी निजहितार्थ। तो तो करावा निश्चित। हें नारदोक्त ऐकोनी॥४६॥

सीताहरण कसे करावे, असे रावण नारदाला विचारतो : स्वयें बोलतो रावण। युद्धीं माझा जाय प्राण। ऐसें श्रीरामें करणें रण। तें वैरकारण मज सांगें॥४७॥ भूत भविष्य वर्तमान। स्वामींसी आहे निजज्ञान। श्रीरामासीं वैरकारण। कृपा करून मज सांगा॥४८॥ श्रीरामासीं झोंटधरणी[5]। दुर्धर युद्ध करणें रणीं। ऐसी आवडी माझे मनीं। ते स्वामींनीं पुरवावी॥४९॥ श्रीरामहस्तें निमाल्या जाण। मी पावेन ब्रह्म पूर्ण। यालागीं करावया रण। उद्यत मन पैं माझें॥१५०॥ ऐसें पुसत दशानन। नारद वदे हास्यवदन। मुख्य वैरासीं कारण। वनप्रयाण श्रीराम॥५१॥

पितुर्नियोगात्स विभुर्दंडके विविधे वने। विचरिष्यति धर्मात्मा सह भ्राता सपत्निकः॥

श्रीराम सीतेसह वनवासाला येतील, त्यावेळी सीताहरण कर, असे नारद रावणाला सांगतात : दशरथाज्ञा श्रीरघुनाथ। वनीं वनवासी दंडकारण्यांत। लक्ष्मणसीतासमवेत। येईल निश्चित जनस्थाना॥५२॥ तेथें करोनियां छळण। करावें त्याचें दारहरण[6]। हें वैराचें कारण। रणीं रावण मारावया॥५३॥ श्रीरामबाणांच्या आघातीं। निमोनि देह पडे क्षितीं[7]। तंव न सोडावी सीता सती। सायुज्यमुक्ती पावावया॥५४॥

नारदस्य तु तद्वाक्यं चिंतयित्वा मुहुर्मुहुः। रावणो मुमुदे श्रीमान्युद्धार्थी विचचार ह॥४२॥

नारदाचा सल्ला ऐकून रावण सीतेला मुक्त न करिता श्रीरामांच्या हातून मुक्ती मिळविण्याचा निर्धार करतो : ऐकोनी नारदाचें वचन। आल्हादें नाचे दशानन। श्रीरामासी करावया रण। हर्ष पूर्ण युद्धाचा॥५५॥ साक्षेपें[8] सांगितलें बहुतीं। रावण न सोडी सीता सती। श्रीरामहस्तें पावावया मुक्ती। मुनिवचनोक्तीं विश्वासें॥५६॥ हा इतिहास पुरातन। धर्मऋषीनें आपण। मंदोदरीप्रति सांगोन। केलें गमन स्वाश्रमा॥५७॥ एका जनार्दना शरण। जाहलें पूर्व निरूपण। पुढील कथा अति गहन। श्रोतीं अवधान मज द्यावें॥५८॥ स्वस्ति श्री भावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां नारदरावणसंवादो नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः॥२४॥ ओंव्या॥१५८॥ श्लोक॥४२॥ एवं॥ २००॥

---

शब्दार्थ : १. काजव्यांसमान, २. बरोबर असणारी, ३. प्रकाश, ४. स्पष्ट करून, ५. एकमेकांचे केस धरून भांडणे, ६. स्त्री-जानकी - तिचे हरण, ७. पृथ्वीवर, ८. अगत्याने.

# अध्याय पंचविसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नम: ॥

## कुंभकर्णाचा युद्धाला प्रारंभ

रावण मंदोदरीला गुप्तरहस्य सांगून परत पाठवितो : पूर्वप्रसंगामाझारीं। सभेसीं आली मंदोदरी। तिसी एकांत गुह्योत्तरीं। धाडी अंत:पुरीं रावण॥१॥

अंत:पुराय गच्छ त्वं सुखिनी भव सस्नुषा। एवमुक्त्वा परित्यज्य भार्यां प्रीतमना इव॥१॥
रावणस्तु ततो वाक्यं राक्षसानिदमब्रवीत्। कल्प्यतां मे रत: शीघ्रं क्षिप्रमानीयतां धनु:॥२॥
अथादाय शितं शूलं शत्रुशोणितरंजितम्। कुंभकर्णो महातेजा रावणं वाक्यमब्रवीत्॥३॥
अहमेको गमिष्यामि रणं रणविशारद॥४॥

मंदोदरीचे निर्गमन : रावणें मंदोदरीप्रती । सांगोनि एकांत गुह्योक्ती। समाधानसुखानुवृत्तीं। अंत:पुराप्रती पाठवी॥२॥ सपुत्रस्नुषेंसीं[1] आपण। सांडोनि चिंता अनुद्विग्न[2] । सुखी राहावेंस समाधान। सुप्रसन्न सुखरूप॥३॥ ऐकोन रावणाचें वचन। मंदोदरी सुखसंपन्न। करोनियां साष्टांग नमन । आली आपण निजधामा॥४॥

रावण युद्धासाठी सैन्य व रथ आणवितो : येरीकडे दशानन। पाचारोनि सैन्य प्रधान। रथ आणवी गर्जोन। रणकंदन करूं आजी॥५॥ ऐकोनि रावणाचे गर्जन। काळकृतांतासमान। स्वयें उठला कुंभकर्ण। शूळ घेवोनि साटोपें[3]॥६॥ शत्रुरुधिरें पैं रंजला। मेदोमांसें माखला। धगधगीत शूळ घेतला। मग गर्जला कुंभकर्ण॥७॥ मी जवळी असतां जाण। युद्धा कां रिघे रावण। एकाला एक मी आपण। करीन कंदन[4] शत्रूंचें॥८॥ शत्रु बापुडे ते किती। मज संमुख केंवी राहती। एकला एक मी निश्चितीं। करीन समाप्ती शत्रूंची॥९॥

कुंभकर्णस्य वचनं श्रुत्वोवाच महोदर:। कुंभकर्ण कुले जातो वृथा प्राकृतदर्शन:॥५॥
येन पूर्वं जनस्थाने बहवो राक्षसा हता:। तं शूरं राघवं संख्ये कथमेको हनिष्यसि॥६॥
एवमुक्तस्तु संकुद्ध: कुंभकर्णो महोदरम्। उवाच रक्षसां मध्ये राक्षसं रावणोपमम् ॥७॥
स तथोक्तो विविर्भत्स्यं कुंभकर्णो महोदरम्। आददे निशितं शूलं शत्रुशोणितरंजितम्॥८॥
खड्गं कालायसं दीप्तं तप्तकांचनभूषितम्। इंद्राशनिसमं घोरं वज्रप्रतिमभैरवम्॥९॥

महोदराचा कुंभर्णाला सल्ला : एकाला एक रणव्युत्पत्ती। करीन शत्रूची समाप्ती। महोदरें ऐकोनि युक्ती। कुंभकर्णाप्रती वर्म बोले॥१०॥ कुंभकर्णा तूं सुकुळीन। तुज सन्मानी दशानन। तुझ्या अंगी बळ संपूर्ण। परी मूर्खपण विशेष॥११॥ राम राक्षसां कंदकुदळ[5]। राम राक्षसां केवळ काळ। त्यासीं एकला रणकल्लोळ। करिसी केवळ मूर्खत्वें॥१२॥ एकला एक पदाती[6] रामचंद्र। चौदा सहस्र निशाचर। त्रिशिरा दूषण आणि खर। विंधोनि शर मारिले॥१३॥ एकेंचि बाणें वाळी। लोळविला आतुर्बळी। तुज मारितां रणकल्लोळीं। करील होळी बाणें एकें॥१४॥ अति स्थूळ तुझें शरीर। तेणें दिसतोसि दुर्धर। परी लागतां श्रीरामाचे शर। न मागतां नीर[7] मरशील॥१५॥

महोदराच्या सल्ल्यामुळे कुंभकर्ण क्रोधाविष्ट होऊन युद्धाला निघतो : ऐकोनि महोदरवचन। कोपा चढला कुंभकर्ण। महोदरातें निर्भर्त्सून । काय आपण अनुवादे॥१६॥ तूं तंव केवळ

---

शब्दार्थ : १. पुत्र आणि सून यांसह, २. सुखी होत्साती, ३. आवेशाने, ४. नाश, ५. कंद खणणारी कुदळच, ६. पायी चालणारा. ७. पाणी.

हीन दीन। युद्धापासीं पलायमान। एकल्या न करवे रण। नपुंसकपण तुजपासीं ॥१७॥ युद्धा जातां येईल मरण। हें तुजपासीं भेडपण। युद्धापासीं पलायमान। नपुंसकपण तुजपासीं ॥१८॥ युद्धा जातां ज्यासीं जाण। नाठवे देह गेह[1] मरण। तोचि शूर पैं संपूर्ण। विजय पूर्ण त्यापासीं ॥१९॥ नपुंसक जो हीन दीन। तो तूं रावणाचा प्रधान। सभेंसीं पावसी सन्मान। काळें वंदन पैं तुझें ॥२०॥ तुझे बुद्धीचें प्राधान्य। अधर्मी केला दशानन। जळो तुझें काळें वदन। निंद्य रावण तुझेनि ॥२१॥ तुज जरी असती सुबुद्धी। तरी सीता देवोनि रामीं संधी[2]। कां न करिसी तूं कुबुद्धी। तुझेनि दुर्बुद्धि रावण ॥२२॥ आम्हां सांगतोसी बुद्धी। सवर्था न रिघावें युद्धीं। हगीर भ्याड[3] तूं त्रिशुद्धी[4]। सभेमर्थी नसावासी ॥२३॥ ऊठ वेगें नीघ सभेबाहेरी। नाहीं तरी हाणीन तोंडावरी। महोदरातें नानापरी। कुंभकर्ण भारी निंदीतसे ॥२४॥ ऐसें बोलोनि आपण। शूळ घेवोनियां जाण। स्वयें उठिला कुंभकर्ण। अति गर्जोन युद्धार्थी ॥२५॥ केवळ तिख्याचा[5] दारूण[5]। शतधार शूळ पूर्ण। सुवर्णबंदी शोभायमान। विद्युत्समान निजतेज ॥२६॥ शत्रुरुधिरें न्हाणिला। मेदें मांसें दिसे माखला। कुंभकर्णे शूळ घेतला। स्वयें चालिला युद्धासीं ॥२७॥ कुंभकर्ण अति आवेशी। स्वयें निघतां युद्धासीं। अति उल्लास रावणासीं। सवें त्यासी सन्मानी ॥२८॥

अथासनात्समुत्पत्य मणिं सूर्यसमप्रभम्। आबबंध महातेजा: कुंभकर्णस्य मस्तके ॥१०॥
अंगदे ह्यंगुलीयानि कवचं च महाधनु:। हारं च शशिसंकाशं स बबंध महामना: ॥११॥
दिव्यान्सुगंधमाल्याश्च रत्नानि विविधानि च। गात्रेषु योजयामास कुंडले च महाभुज: ॥१२॥
कांचनांगदकेयूरनिष्कप्रवरभूषण:। कुंभकर्णो महाबहुर्हुतोऽनल इवाबभौ ॥१३॥

**हर्षभरित रावणाकडून कुंभकर्णाचा बहुमान :** उठोनियां अति आवेशीं। त्यागोनियां सिंहासनासी। स्वयें[6] रावण कुंभकर्णासी। अति उल्लासीं पूजित ॥२९॥ मुगुट कुंभकर्णालागूनी। त्याच्या मस्तकी महामणी। दिव्यतेजें लोपतो तरणी[7]। ऐसा आणोनी बाणिला ॥३०॥ बाही बाहुवटें रत्न भूषणें। करमुद्रिका करकंकणें। अनर्घ्य कुंडलें रावणें। प्रीतीं पूजिला कुंभकर्ण ॥३१॥ कवचादि दिधलें अमोलिक। माळा दिधल्या अलोलिक। श्वेत रक्त अति सुटंक[8]। चंदन चोख चर्चिलें ॥३२॥ दिव्य चंदनाचा टिळा[9]। तेणें शोभत वीरमर्गळा[10]। त्यावरी दिव्य सुमनमाळा। घातल्या गळां रावणें ॥३३॥ कंठी पदक एकावळी। जडितरत्न प्रभावळी। दोहीं भागीं मुक्ताफळीं। इंद्रनीळीं महाशोभा ॥३४॥ रत्नखचित अलंकार। रावणें अर्पिले अपार। होमीं हविला[11] वैश्वानर[12]। तैसा दुर्धर आभासे ॥३५॥

श्रोणीसूत्रेण महता कांचनेन विराजित:। अमृतोत्पादने नद्धो भुजगेनेव मंदर: ॥१४॥
सर्वाभरणजुष्टांग: शूलपाणि: स राक्षस:। स रावणं परिष्वज्य कृत्वा चापि प्रदक्षिणम् ॥१५॥
प्रणम्य शिरसा चैनं संप्रतस्थे महाबल:। तस्य सूतो रथं दिव्यं पंचनल्वप्रमाणत: ॥१६॥
युक्तं खरसहस्त्रेण युद्धध्वजविभूषितम् ॥१७॥

कुंभकर्णासी कटिसूत्र। देता जाला दशशिर। कैसा बाणला[13] अलंकार। तोही चमत्कार अवधारा ॥३६॥ समुद्रमंथनी जेंवी मंदर। शेषें वेष्टिला सपरिकर[14]। तेंवी कुंभकर्णा कटिसूत्र। मनोहर आभासे ॥३७॥ सर्वाभरणीं शोभायमान। युद्धा निघतां कुंभकर्ण। आलिंगोनि दशानन। मस्तकीं चरण वंदिले ॥३८॥

---

**शब्दार्थ :** १. घर, २. मैत्री, ३. भित्रा, ४. खरोखर, ५. अत्यंत तीव्र, ६. स्वत:, ७. सूर्य, ८. फार शोभायमान, ९. तिलक, १०. वीराकृती, ११. पेटविला, चेतविला, १२. अग्नी, १३. शोभला, १४, जवळच्या सरंजामासुद्धा.

कुंभकर्णाचें रावणास वंदन व रथावर आरोहण : करोनियां प्रदक्षिणा। पुढती लागला चरणा। येथोनि आतां रावणा। भेटी दोघां जणां खुंटली ॥३९॥ रणीं भिडोनि रघुनाथा। परतोनियां येईन मागुता। ही तंव सहसा न घडे कथा। लंकानाथा सत्यत्वें ॥४०॥ तुझिया निजकार्यार्था। युद्ध करोनियां दुर्धरता। तुजलागोनि वेंचीन जीविता। सत्यवार्ता हे माझी ॥४१॥ ऐकोनी कुंभकर्ण वचन। दोघां बंधूंसीं आलें रुदन। तेव्हां कुंभकर्णे आपण। केले गर्जन साटोपें ॥४२॥ सारथियें आणिला शीघ्र रथ। सहस्र खरीं[1] संयोजित। युद्धध्वजें अति शोभित। प्रमाण तेथ पंच पंच ॥४३॥ कुंभकर्णाचे पंच पंच हस्त। तेचि प्रमाणें रथीं रथस्थ। तेथें बैसोनियां त्वरित। निघे युद्धार्थ कुंभकर्ण ॥४४॥

महाजलधिनिर्घोषं कैलासशिखरोपमम्। अष्टचक्रं महावेगमुपनीतं महारथम् ॥१८॥
स तं समारुह्य ययौ मेघगंभीरनिस्वनः। सोऽतिकायो महातेजा राक्षसैः परिवारितः ॥१९॥
तमाशीर्भिः प्रशस्ताभिः प्रेषयामास रावणः। शंखदुंदुभिनिर्धोषै : सैनिकैश्च वरायुधैः ॥२०॥
तं गजैश्च चतुर्दंतै : स्यंदनैश्चांबदस्वनैः। अन्वगच्छन्महात्मानो रथिनं रथिनां वरम् ॥२१॥
स पुरद्वारमासाद्य राक्षसो घोरदर्शनः। निपपात महातेजाः कुंभकर्णः प्रतापवान् ॥२२॥

सैन्यासह कुंभकर्णाचे रणभूमीकडे प्रयाण : प्रळयमेघाचा कडकडाट। तैसा रथाचा घडघडाट। कैलासशिखरासम श्रेष्ठ। रथचक्रे घडघडती ॥४५॥ कुंभकर्ण बैसोनि येथ। रथ प्रेरिला[2] गर्जत। रावणें संतोषोनि तेथ। सैन्य समस्त सवें धाडी ॥४६॥ पुरस्कारोनियां[3] विशद। रावणें देवोनि आशीर्वाद। कुंभकर्ण वीर प्रसिद्ध। करावया युद्ध धाडिला ॥४७॥ चतुर्दंत गजसंभारी। सवें चालती सालंकारी। अश्वगजरथांची हारी[4]। केला घोरीं गडगर्ज ॥४८॥ शंख भेरी मृदंग गहन। त्राहाटिलें रणनिशाण। कुंभकर्णा आलें स्फुरण। स्वयें गर्जोन चालिला ॥४९॥ कुंभकर्णाचे पाठीसीं। सैन्य दाटलें चौपासीं। अनुलक्षोनियां त्यासीं। संग्रामासीं निघाले ॥५०॥ कुंभकर्ण महावीर। रथ प्रेरिला सत्वर। ठाकोनि आला नगरद्वार। छत्रातपत्र क्षोभत ॥५१॥

सपुष्पपर्णैरवकीर्यमाणो धृतातपत्रः शितशूलपाणिः।
मदोत्कटः शोणितपानमत्तो विनिर्ययौ राक्षसयोधमुख्यः ॥२३॥
कुंभकर्णो महावक्त्रः प्रहसन्वाक्यमब्रवीत्। अद्य वानरमुख्यान तानि यूथानि भागशः ॥२४॥
निर्दहिष्यामि संक्रुद्धः शलभानिव पावकः। स वै रामसहायश्च ये चान्ये मम शत्रवः ॥२५॥
नापराध्यंति मे कामं वानरां वनचारिणः। हते यस्मिन्हताः सर्वे तं हनिष्यामि संयुगे ॥२६॥
एवं तस्य ब्रुवाणस्य कुंभकर्णस्य रक्षसः। बभूवुर्घोररूपाणि निमित्तानि समंततः ॥२७॥

कुंभकर्णाची रणगर्जना : युद्धा निघतां कुंभकर्ण। पुष्पवृष्टि करी रावण। छत्रचामरीं शोभायमान। उल्हास पूर्ण युद्धाचा ॥५२॥ रुधिरपानें रुधिरोन्मत्त। मद्यपानें मदोन्मत्त। युद्ध करावया बळोन्मत्त। सैन्यसमवेत निघाला ॥५३॥ विक्राळवदन कुंभकर्ण। करावया रणकंदन। स्वयें बोलताहे गर्जोन। आंगवण युद्धाची ॥५४॥ वानरयूथप[5] बहुत। रणकर्कश रणोन्मत्त। ते मी मारीन समस्त। जेंवी वणव्यांत पतंग ॥५५॥ अंगद सुग्रीव जांबवंत। नळनीळादि हनुमंत। यूथपें यूथप समस्त। मारीन येथ शोधशोधूं ॥५६॥ वानर बापुडें वनचर। त्यांसी मज नाहीं वैर। मुख्य वैरी श्रीरामचंद्र। त्यासीं वानर रणीं साह्य ॥५७॥ लक्ष्मणासीं समवेत। रणीं मारिल्या रघुनाथ। वानर निमाले[6] समस्त। ऐसा युद्धार्थ साधीन ॥५८॥ श्रीराम आणि सुमित्र। दोघे बंधु मनुष्यमात्र। आधीं गिळीन ते स्वतंत्र। मग वानर भक्षीन ॥५९॥ कुंभकर्णाचा

---

शब्दार्थ : १. गाढवांनी, २. पाठविला, ३. उत्तेजन देऊन, ४. समुदाय, ५. वानरसैन्याचा मुख्य, ६. मृत्यू पावले.

गिरागजर। तेणें कांपती गिरिसागर। त्यामाजी गर्जती निशाचर। युद्धा सत्वर निघाले ॥६०॥ ऐसेनि अति उल्लासीं। युद्धा जातां कुंभकर्णासीं। अपशकुन जाले त्यासी। चहूं भागांसीं दुश्चिन्ह ॥६१॥

निपपात च गृध्रोऽस्य रथस्योपरि गच्छत:। प्रास्फुरन्नयनं चास्य सव्यो बाहुरकंपत ॥२८॥
गगनान्निपपातोल्का ज्वलंती भीमनि:स्वना। आदित्यो निष्प्रभश्चासीन्न वाति च सखोऽनिल: ॥२९॥
अचिंतयन्महोत्पातानुत्थिताञ्जीवितांतकान्। निर्ययौ कुंभकर्णस्तु कृतांतबलनोदित: ॥३०॥

**कुंभकर्णाला मार्गामध्ये अपशकुन :** कुंभकर्ण निघतां गजरीं। उलक[1] बैसला ध्वजावरी। गीध बैसला त्याचे शिरीं। शिवा श्वान खरी भुंकती ॥६२॥ भूस्फोट नगरद्वारीं। भूकंप होत नगरीं। विजू पडली निरभ्री। प्राणसंहारी कडकडाट ॥६३॥ अशुभ पक्षी किलकित। अपसव्य परिभ्रमत। क्रूर उल्कापात[2] होत। जीवितांत राक्षसां ॥६४॥ कुंभकर्णाचा स्वयें आपण। अशुभें लवे वामलोचन। वामबाहूचें अशुभ स्फुरण[3]। जय संपूर्ण लाभेना ॥६५॥ सूर्य जाला प्रभाहीन। प्रतिकूळ वायूचा सणाण। आजिच्या युद्धीं न वाचती प्राण। अचुक मरण राक्षसा ॥६६॥ कुंभकर्ण ते अवसरीं। अपशकुनांतें अव्हेरी । अंतका अंतक बळाची थोरी। आला संभारीं रणरंगीं ॥६७॥

स निष्क्रम्य पुरीद्वारात्कुम्भकर्णो महाबल:। ननाद च महानादं समुद्र सव पर्वणि ॥३१॥
तं दृष्ट्वा राक्षसश्रेष्ठं वानरा: पर्वतोपमम्। वायुक्षिप्ता यथा मेघा ययु: सर्वा दिशस्तदा ॥३२॥
तद्वानरानीकमतिप्रचंडं दिशो द्रवद्भिन्नमिवाभ्रजालम् ।
स कुम्भकर्ण: समवेक्ष्य हर्षान्ननादनादं घनवंद्घनाभ: ॥३३॥
ते तस्य घोरं निनदं निशम्य यथा निनादं दिवि वारिदस्य।
पेतुर्धरण्यां बहव: प्लवंगा:। निकृत्तमूला इव शालवृक्षा: ॥३४॥

**कुंभकर्णाच्या गर्जनेमुळे वानरसैन्याची पळापळ :** येवानि नगराबाहेरी। सेना देखानि वानरी। कुंभकर्ण गिरागजरीं। घर्घरस्वरीं गर्जिन्नला ॥६८॥ ज्याचा ऐकतांचि रव। मूर्च्छित पडती देवदानव। तेणें नादें वानर सर्व। घेवोनि जीव पळाले ॥६९॥ नाद ऐकता कडकडाटीं। लहान सान वानरथाटी। धाकें पडती पटपटीं। मूर्च्छित सढष्टीं कपिकुळ ॥७०॥ कुंभकर्ण क्रूराभासा[4]। वानरीं सांडिला युद्धधिंवसा[5]। स्वयें पळती दश दिशा। एक आकाशा लंघिती ॥७१॥ पळतां देखोनि वानर। कुंभकर्णा हर्ष थोर। पुढती गर्जे दीर्घस्वर। तेणें वनचरें विव्हळत ॥७२॥ एक पळाले समुद्रतीरीं। एक रिघाले गिरिकंदरीं। एक लपाले वृक्षांवरी। एक ते विवरीं दडाले ॥७३॥ एक ते जाले पिसीं। एक ते पळती चौपासीं। अंगद अभय देत वानरांसी। दशा ऐसी देखोनी ॥७४॥ छेदिल्या वृक्षांचें पैं मूळ। उलंडती शाल ताल। तैसें वानरांचें दळ। अति विव्हळ देखोनी ॥७५॥

तांस्तु विद्रवतो दृष्ट्वा राजपुत्रोंऽगदोऽब्रवीत् ।आत्मनस्तानि विस्मृत्य वीर्याण्यभिजनानि च ॥३५॥
साधु सौम्या निवर्तध्वं किं प्राणान्परिरक्षय। नालं युद्धाय वै रक्षो महतीयं बिभीषिका ॥३६॥
विक्रमाद्विधमिष्यामो निवर्तध्वं प्लवंगमा:। कृच्छ्रेण महाताश्वास्य संस्तभ्य च ततस्तत: ॥३७॥
शिलापादपहस्तास्ते तस्थु: संग्राममूर्धनि। निर्जग्मु: परमक्रुद्धा: समदा इव कुंजरा: ॥ ३८ ॥

**अंगदाच्या निर्भत्सनेमुळे वानरसैन्य परत येते :** पळतां देखोनि वानर। अंगद जो कां राज

---

**शब्दार्थ :** १. घुबड, २. तारे पडणे, ३. फुरफुरणे, ४. दिसण्यांस अति क्रूर असा, ५. युद्ध करण्याविषयीचे धैर्य.

कुमर। परतावया कपि समग्र। काय उत्तर बोलत ॥७६॥ रणीं मारूं दशानन। श्रीरामापासीं बोलां गर्जोन। ते तुम्ही न करितां रण। केंवी पळोन जातसां ॥७७॥ पळोनि जातां गांवासी। स्त्रिया निर्भर्त्सिती[१] तुम्हांसी। पाठी दिधली संग्रामासी। श्याममुखेंसीं[२] आलेती ॥७८॥ स्त्रिया म्हणती काळतोंडें। पळोनि आलीं माकडें। मरणाहूनियां गाढें[३]। दु:ख रोकडें पावाल ॥७९॥ जळो तुमचें काळें वदन। नपुंसकांहूनि हीन दीन। रणीं सांडोनि रघुनंदन। केंवी पळोनि आलेती ॥८०॥ पळोनि गेलिया वानर। तुम्ही काय व्हाल अजरामर[४]। पळणें हीन दीन विचार। सांडोनि शीघ्र परतावें ॥८१॥ आम्ही सुकुळींचे वानर। जन्मोनियां वीर शूर। करितां पळण्याचा विचार। ब्रीदें[५] समग्र हरविलीं ॥८२॥ पूर्वजांसी आणोनि उणें। पळोनि जातां नरका जाणें। यालागीं धरोनि आंगवणें । स्वयें परतणें संग्रामा ॥८३॥ धरोनि देहलोभाचा स्वार्थ। रणीं सांडितां रघुनाथ। पदोपदीं नरकपात। आकल्पांत पावाल ॥८४॥ कुंभकर्णाची पैं गोष्टी। पोंचट तन[६] मांसमोठी। तेणें भेणें तुम्ही करंटी। उठाउठीं पळतसां ॥८५॥ करितां श्रीरामस्मरण। आम्हां बाधूं न शके मरण। विभांडीन मी कुंभकर्ण। आंगवण पहा माझी ॥८६॥ ऐकोनि अंगदाचें वचन। परस्परें आश्वासून। परतले वानरगण। आंगवणसाशंक ॥८७॥ अंगद सांगे जीवींची खूण। सांडून देहलोभ विस्मरण। करितां रामनामस्मरण। आंगवण पावाल ॥८८॥ करितां रामनामस्मरण। वानरां आलें अति स्फुरण। शतधा[७] वाढली आंगवण। कुंभकर्णसंग्रामा ॥८९॥ करितां रामनामगजर। मदोन्मत्त जेंवी कुंजर[८]। तैसे परतले वानर। निशाचर रणमारा ॥९०॥ शिळा शिखरें तरुवर। वानरीं सज्जून हातियेर। युद्धीं परतले दुर्धर। करीत गजर नामाचा ॥९१॥ अंगदाचे गोष्टीसाठीं। वानरवीरांचियां कोटी। धैर्य धरोनियां पोटीं। उठाउठीं परतले ॥९२॥

निजघ्नु: परमक्रुद्धा: कुंभकर्ण वनौकस:। पांसुभिर्वालतालैश्च शिलाभिश्च महाबला: ॥३९॥
पादपै: पुष्पिताग्रैश्च वध्यमानो न चुक्षुभे। वानरास्तु सुसंक्रुद्धा गिरिशृंगैर्महाबला: ॥४०॥
राक्षसानामनीकानि विनिर्जघ्नु: सहस्रश:। तच्छैलवेगाभिहतं हत्वा स्वरथवारणम् ॥४१॥

**कुंभकर्णावर शिलावृक्ष वर्षाव आणि राक्षसांचा संहार :** वानरीं धरोनियां आंगवण। पाचारोनि कुंभकर्ण। शिळा पर्वत पाषाण। संमुख गर्जोन हाणिती ॥९३॥ शतसहस्र कोट्यनुकोटी। वानर भिडती जगजेठी। शिळापर्वतवृक्षवृष्टीं। कडकडाटीं हाणती ॥९४॥ वानरीं व्यापिलें भूतळ। वानरीं व्यापिलें नभोमंडळ। कुंभकर्णातें कपि सकळ। शाल ताल हाणिती ॥९५॥ जैशा माशा मोहळासी। तैसे वानर चौपासीं। वेढूनियां कुंभकर्णासी। अति आवेशीं हाणिती ॥९६॥ वानर हाणिती जे जे घाय। कुंभकर्णासीं तृणप्राय। वानर बापुडे ते काय। अलक्ष पाहे लक्षेना ॥९७॥ कुंभकर्णासीं पर्वत। लागूनि शतचूर्ण होत। शिळा होती शकलीभूत। वृक्ष मोडत शाल ताल ॥९८॥ जैसे कां ढेंकुण सेजेसीं। तैसें वानर चौपासीं। झोंबती कुंभकर्णासीं। परीं तो त्यांसी गणीना ॥९९॥ न डंडळी कुंभकर्ण। वानरीं जाणोनि आपण। त्याच्या सैन्यासीं केलें कंदन। रणविंदान अवधारा ॥१००॥ रणीं क्षोभोनि वानर। करोनि पर्वतांचा मार। सैन्य मारिलें शतसहस्र। गज खरोष्ट्र[१०] रथाचे ॥१॥ अश्व सारथी रहंवर[११]। गजपती निशाचर। रणीं मारिले अपार। अवनीं रुधिर प्रवाहे ॥२॥ रणीं क्षोभोनी प्लवंगम[१२]। दुर्धर केला पैं संग्राम। मांसशोणितकर्दम[१३]। रण दुर्गम राक्षसां ॥३॥ मारोनियां निशाचर। रणीं गर्जती वानर। अवघीं केला जयजयकार। करीत गजर हरिनामें ॥४॥ मारिली देखोनि निजसेना। कोप आला कुंभकर्णा। मारावया वानरगणा। आंगवणा ऊठिला ॥५॥

---

**शब्दार्थ :** १. छीथू करतील, फजिती करतील, २. काळी तोंडे घेऊन, ३. मोठे, ४. अमर, ५. कीर्ती, ६. शरीर, ७. शंभरपट, ८. हत्ती, ९. तुकडेतुकडे, १०. गाढव आणि उंटे, ११. रथ, १२. वानर, १३. मांसाचा आणि रक्ताचा चिखल.

थोर थोर वानरगण। कुंभकर्णासीं करितां रण। एका जनार्दना शरण। सावधान अवधारा ॥६॥ सावध ऐकतां रामायण। चारी मुक्ती येती शरण। करितां नित्य नामस्मरण। ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥१०७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां कुंभकर्णयुद्धप्रारंभो नाम पंचविंशतितमोऽध्यायऽ॥२५॥ ओंव्या ॥१०७॥ श्लोक ॥ ४१॥ एवं ॥१४८॥

## अध्याय सव्विसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### हनुमंत - कुंभकर्ण युद्ध

क्रोधाविष्ट कुंभकर्णाकडून वानरसैन्याचा संहार : रणीं मारिले निशाचर। कुंभकर्णासीं क्रोध फार। गिळावया पैं वानर। अति सत्वर धांवला॥१॥ संमुख येतां कुंभकर्ण। मागां न सरती वानरगण। अंगदें आश्वासिलें पूर्ण। करावया रण उद्यत॥२॥

ते निवृत्ता महाकायाः श्रुत्वांगदवचस्तदा। नौष्ठिकीं बुद्धिमास्थाय सर्वे संग्रामकांक्षिणः॥१॥
अथ वृक्षान्महाकायाः शृंगाणि सुमहांति च। वानरास्तूर्णमुत्पाट्य कुंभकर्णमभिद्रवन्॥२॥

अंगदाचा वानरसैन्याला धीरः देवोनि रामनामाचा धीर। अंगदें परतविलें वानर। करोनि वाढिवेचा गजर। धांवले समोर कुंभकर्णा॥३॥ सांडोनि शरीराची आस। मरणावरी घालोनि कांस। वानरवीरां विशेष। अति उल्लास संग्रामीं॥४॥ रामनामाच्या गजरीं। मरण घालून[१] तोडरी[१]। कुंभकर्णासीं समरीं। युद्ध वानरीं मांडलें॥५॥ कुंभकर्ण आवेशें येत। त्यासी वानरवीर समस्त। शिळा शिखरें पर्वत। स्वयें हाणित साटोपें॥६॥ कुंभकर्ण रागेंकरीं। वानरां करावया बोहरी। धरोनियां दोहीं करीं। मुखाभीतरीं घालीत॥७॥ वानर घालितां मुखांतरीं। सवेंचि निघती कर्णद्वारीं। बैसोनियां नाकावरी। भुभुःकारीं गर्जत॥८॥ रिघोनियां कर्णद्वारी। वानर चढले मुगुटावरी। एक बैसले ध्वजाग्रीं। एक छत्राग्रीं वळंघले॥९॥ वानर गेले हातोहात। मुख राहिलें हकहकित[२]। चवी न लभेचि निश्चित। समसमित[३] अवाळीं[४]॥१०॥ जिव्हा राहिली वणवणीत। आसावलें[५] ठेले दांत। कांही नाढळे मुखांत। चरफडित कुंभकर्ण॥११॥ वानर नाढळती घांसासीं। राग आला कुंभकर्णासीं। मारावया वानरांसी। अति आवेशीं चालिला॥१२॥ छेदावया वानरांचा कंद। कुंभकर्णा आला क्रोध। तंव पावला अंगद। रणबंधसमवेत॥१३॥

अंगदः कुमुदो नीलो गवाक्षो गवयो हरिः। मैंदोऽथ द्विविदश्चैव जांबवान्विनतस्तथा॥३॥
युगपद्व्यहनन्सर्वे कुंभकर्णं महाबलम्। तस्य गात्रे विनिक्षिप्ताः शिलाः शैलनिभास्तदा॥४॥
ध्वजं रथं खरांश्चैव शूलं चैव न्यपातयन्॥५॥

अंगद वानरसेनानींसमवेत कुंभकर्णाचा रथ व सारथी पाडतो : कोपें येतां कुंभकर्ण। अंगदादि दाही जण। उठावले वानरगण। कोण कोण ते ऐका॥१४॥ अंगद कुमुद नील प्रख्यात। गवाक्ष गवय आणि विनत। मैंद द्विविद जांबवत। हरि विख्यात महावीर॥१५॥ इहीं दहा जणीं वीरीं। क्षोभें कुंभकर्णावरी। शिळा शिखरें पर्वत गिरी। बहु तरुवरी हाणिल्या॥१६॥ कुंभकर्णाच्या अंगावरी। शिळा शिखरें होत चुरी। पिष्ट होइजे तरुवरीं। महावीरी हाणितां॥१७॥ अंगदाची प्रबळ शिळा। न भेदीच त्याच्या शूळा। रथ सांडोनि उडाला। गजबजिला

शब्दार्थ : १. पर्वा न करून, २. अतृप्त, ३. कोरडे, ४. ओष्ठप्रांत, ५. आशाभूत.

कुंभकर्ण ॥१८॥ रथ सारथी सहस्रखर। ध्वज पताका सहितछत्र। अवघा केला चकचूर। अंगदवीरें गर्जोनी ॥१९॥ अंगदें थोर केली ख्याती। कुंभकर्ण केला विरथी[1]। तेणें गदा घेतली हातीं। कोपानुवृत्तीं धांविन्नला ॥२०॥

सोऽवप्लुत्य रथाद्वीरो गदामुद्यम्य सत्वरम् । वेगेनाभ्युत्पपाताशु पक्षवानिव पर्वत: ॥६॥
स कुम्भकर्ण: संक्रुद्ध : शूलमुद्यम्य वीर्यवान्। शतानि सप्त चाष्टौ च सहस्राणि च वानरा: ॥७॥
प्रकीर्णा: शेरते भूमौ कुंभकर्णनिपातिता: । षोडशाष्टौ च दश च सहस्रं वापि वानरान् ॥८॥
संपारिष्वज्य बाहुभ्यां निष्पिपेष स राक्षस: ॥९॥

कुंभकर्णाचा आवेश : रथ सारथि होतां चूर। उडोनि गेला निशाचर। गदाशूळेंसीं सशस्त्र। मारूं वानर धांवला ॥२१॥ अंगदवाक्यप्रबोधनीं[2]। वानरवीर रणांगणी। पाठीं देणें नाही कोणी। भिडती रणीं साटोपें ॥२२॥ कुंभकर्ण शूळहस्तें। एके घायें वानरातें। सात शतें आठ शतें। खोंचून अमितें पाडिलीं ॥२३॥ पसरोनियां दोन्ही हात। सोळा शत अठरा शत। दहा सहस्र असंख्यात। कपि मारीत आवेशीं ॥२४॥ वानरवीर असंख्यात। कुंभकर्णे खेंव्याआंत[3]। रगडूनियां अपरिमित। रणीं बहुत पाडिले ॥२५॥ वानरवीरांचियां श्रेणी[4]। कुंभकर्णे पाडिल्या रणीं। अशुद्ध[5] प्रवाहे धरणीं[6]। जाली चिडाणी[7] मेदमांसें ॥ २६ ॥ वानरवीर पडतां रणीं। सुषेण वैद्यशिरोमणी। श्रीरामचरणरज घालोनी। वानरश्रेणी उठविल्या ॥२७॥ मांस भक्षावया तेथ । कुंभकर्ण असे पहात। वानर उठले समस्त। अति विस्मित तेणें जाला ॥२८॥ भक्तां साह्य श्रीरघुनाथ। मरों नेदी निजभक्त। रामनामें पैं गर्जत। कपि समस्त उठले ॥२९॥ रणीं वाढला कुंभकर्ण। त्यासीं करावया रण। कपि पावले पांच जण। शिळापाषाणद्रुमयोद्धे ॥३०॥

ऋषभ: शरभो नीलो गवाक्षो गंधमादन:। पंचवानरशार्दूला: कुंभकर्णमुपाद्रवन् ॥१०॥
शैलैर्वृक्षैस्तलै: पादैर्मुष्टिमिश्च महाबला:। कुंभकर्ण महाकायं सर्वतो व्यहनन्दृढम् ॥११॥
स्पर्शानिव प्रहारांस्तान्मन्यमानो न विव्यथे। ऋषभं तु महावेगं बाहुभ्यां परिषस्वजे ॥१२॥
कुंभकर्णभुजाभ्यां तु पीडितो वानरोत्तम:। पपात ऋषभो भूम्यां मुखादागतशोणित: ॥१३॥

ऋषभ वगैरे वानरवीरांकडून वृक्षशिलादिकांनी कुंभकर्णावर प्रहार: पांचही वीर संग्रामशीळ। ऋषभ शरभ आणि नीळ। गवाक्ष गवय अति प्रबळ। वीरशार्दूळ संग्रामीं ॥३१॥ नीळ निजांगें आपण। घेऊन पर्वत पाषाण। संमुख ठोकिला कुंभकर्ण। रणीं गर्जोन साटोपें ॥३२॥ लागतां पर्वतांचा घात। कुंभकर्ण रुधिरोक्षित[8]। तेणें रागें मुष्टिघात। नीळासीं देत निजहस्ते ॥३३॥ लागतांचि मुष्टिघात। तेणें नीळ रुधिर वमित[9]। विकळ पडिला मूर्च्छित। जेंवी पर्वत वज्रघातें ॥३४॥ नीळ पडतांचि मूर्च्छित। श्रीरामस्मरणान्वित। सर्वेचि होवोनि सावचित्त। आला गर्जत संग्रामा ॥३५॥ शिळा शिखरें प्रचंड शैल[10]। तळघातें शाल ताल। मुष्टीं हाणिती वर्मस्थळ। संग्रामकुशळ कपियोद्धे ॥३६॥ पांचही वीर एकीभूत। होवोनियां संग्रामांत। कुंभकर्णासी भिडत। आले गर्जत साटोपें ॥३७॥ ऐसें लागतां प्रहार। कुंभकर्ण केला जर्जर। ते घाय न मानूनि निशाचर। रणीं दुर्धर खवळला ॥३८॥ ऋषभवीर आतुर्बळी। आकळोनियां करतळीं। खेंव देवोनि रांगोळी। केला तत्काळी कुंभकर्णे ॥३९॥ अति बळें बळवंत। ऋषभवीर अति विख्यात। स्वयें रुधिरातें वमित। रणीं मूर्च्छित पाडिला ॥४०॥

मुष्टिना शरभं चापि जानुना नीलमाहवे। आजघान गवाक्षं च तलेनेंद्ररिपुस्तदा ॥१४॥
शरैरामर्दितस्तत्र सुगंधो गंधमादन:। दत्तप्रहारा व्यथिता मुमुहु: शोणितोक्षिता: ॥१५॥

---

शब्दार्थ : १. रथरहित, २. अंगदाने केलेल्या उपदेशाने, ३. मिठीमध्ये, ४. पंक्ती, ५. रक्त, ६. पृथ्वीवर, ७. पर्वत, ढीग, ८. रक्ताने माखलेला, ९. ओकला, १०. पर्वत.

निपेतुश्चापि मेदिन्यां निकृत्ता इव किंशुकाः। तेषु वानरमुख्येषु पातितेषु महात्मसु ॥१६॥
वानराणां सहस्राणि कुंभकर्णं प्रदुद्रुवुः। ते वानराः खमुत्पत्य सन्नदन्तो महाबलाः ॥१७॥
तं नखैर्दशनैश्चैव जानुभिर्मुष्टिभिस्तलैः। कुम्भकर्णं महाकायं ते निजघ्नु प्लवंगमाः ॥१८॥

कुंभकर्ण ऋषभास मूर्च्छित करून चौघा वानर वीरांचा संहार करतो : ऋषभा पाडोनि मूर्च्छापन्न। उरले जे कां चवघे जण। त्यांवरी धांवला कुंभकर्ण। रणीं गर्जोन साटोपें ॥४१॥ शरभें हाणितला पर्वत। येरें दिधला मुष्टिघात। पर्वत पिष्ट करोनि तेथ। शरभ मूर्च्छित पाडिला ॥४२॥ नीळें हाणितां शिळाशिखर। रागें दिधला पांपर[१]। लातां शिखर करोनि चूर। नीळ महावीर पाडिला ॥४३॥ गवाक्ष वीर अति विख्यात। कुंभकर्णाचे पाडिले दांत। येरें हाणोनि तळघात। रणीं मूर्च्छित पाडिला ॥४४॥ गंधमादन वीर दारुण। शालतालवृक्षीं जाण। हाणोनियां कुंभकर्ण। रुधिरें पूर्ण न्हाणिला ॥४५॥ रागें त्रिशूळ हाणितां जाण। गगना गेला गंधमादन। कुंभकर्ण स्वयें उडोन। धरी धांवोन साटोपें[२] ॥४६॥ सुगंध देखोनि गंधमादन। त्याचें केलें अंगमर्दन। ऐसे पाडिले पांचही जण। केलें गर्जन कुंभकर्णें ॥४७॥ पळवावया वानरभार। धांविन्नला निशाचर। तंव ते निधडे महावीर। युद्धा सत्वर मिसळले ॥४८॥ करोनियां रामानामस्मरण। गगना उडोनि वानरगण। शिळा पर्वत पाषाण। शाल ताल पूर्ण हाणिती ॥४९॥ कुंभकर्ण आतुर्बळी। हाणोनियां निजशूळीं। शिळावृक्षपर्वतजाळी[३]। छेदून तत्काळीं सांडिले ॥५०॥ मारावया वानरकोटी। धांविन्नला उठाउठीं। वानरवीर जगजेठी। कंठी मुकुटीं झोंबले ॥५१॥ कुंभकर्णाचे आंगावरी। चालिल्या वानरांच्या हारी। एक चिरिती नखाग्रीं। एक दशनाग्रीं[४] मारिती ॥५२॥ एक गुडघा हाणिती तळीं। मुष्टिघातें आतुर्बळी। एक हाणिती करतळीं। तनु रक्ताळी तिहीं केली ॥५३॥ वानर मिळोनि समस्त। निष्ठुर हाणोनियां घात। कुंभकर्ण रुधिरात्त[५]। केला रणांत वानरीं ॥५४॥ ऐसें वानरीं करितां रण। कोपा चढला कुंभकर्ण। शूळ घेवोनि आपण। कपिकंदन मांडिलें ॥५५॥

बाहुभ्यां वानरान्सर्वानाकृष्य सुमहाबलः। भक्षयामास संक्रुद्धो गरुडः पन्नगानिव ॥१९॥
मर्दयन्वानरान्सर्वान्संक्रुद्धो राक्षसोत्तमः। मांसशोणितसंक्लेदां कुर्वन्भूमिं स राक्षसः ॥२०॥
वज्रहस्तो यथा शक्रः पाशहस्तो यथांतकः। शूलहस्तो बभौ युद्धे कुंभकर्णो महाबलः ॥२१॥
यथा शुष्काण्यरण्यानि ग्रीष्मे दहति पावकः। तथा वानरसैन्यानि कुंभकर्णो ददाह स : ॥२२॥

कुंभकर्णाकडून वानरसैन्याचा संहार : हाणिता शूळाचा आघात। वानर उडती आकाशांत। कुंभकर्णे पसरोनि हात। कपि समस्त आकळिले ॥५६॥ एक रगडोन भक्षित। एक सगळेचि गिळित। एक शिळातळीं मर्दित। एक चघळित दांतातळीं ॥५७॥ रणीं मारितां प्लवंगम[६]। जालामांसशोणितकर्दम। रणभूमि अति दुर्गम। वानरां परम प्रळयांत ॥५८॥ इंद्र वज्रें करी पर्वतछेदन। पाशहस्तें यम घे प्राण। तेंवी शूळाघातें कुंभकर्ण। वानरां कंदन[७] करीतसे ॥५९॥ जेंवी कां शुष्कवनीं तृणें। ग्रीष्मीं जाळिजे हुताशनें[८]। तेंवी वानरपाळीगणें[९]। कुंभकर्णे त्रासिलीं ॥६०॥

ततस्ते वध्यमानास्तु कुंभकर्णेन वानराः। राघवाभ्याशमाजग्मुर्व्यथिता नष्टचेतसः ॥२३॥

दुःखित वानरसैन्य श्रीरामांकडे येते व हनुमंताचे आक्रमण: कुंभकर्ण करितां घात। वानरां आश्रय श्रीरघुनाथ। त्यापासीं आले समस्त । दुःखाभिभूत कपिकुळें ॥६१॥ कुंभकर्णाच्या आटाटी। श्रीरामें लक्षोनियां दृष्टी। वानर आले कोट्यनुकोटी। रणीं संकटी त्रासूनी ॥६२॥

शब्दार्थ : १. लाथ, २. आवेशाने, ३, शिळा, वृक्ष आणि पर्वत यांचे समूह, ४. दातांच्या अग्रांनी, ५. रक्ताने भरलेला. ६. वानर, ७. नाश, ८. अग्नीने, ९. वानरांचे थवे .

वानरसैन्याची महाआटी[1]। हनुमंतें देखोनियां दृष्टी। रागें उठला कडकडाटीं। फोडावया घाटी[2] कुंभकर्णाची।।६३।। सीताशुद्धी करितां जाण। दीर्घ देखिला कुंभकर्ण। त्यासींच आपण करावें रण। हा संकल्प पूर्ण हनुमंती।।६४।। बळी वाखाणिला कुंभकर्ण। त्यासींच करोनियां रण। त्याची पहावया आंगवण। उल्लास पूर्ण हनुमंता।।६५।। आजी माझें भाग्य समर्थ। प्रसन्न जाला श्रीरघुनाथ। रणीं सांपडला कुंभकेत। युद्धपुरुषार्थ तुकावया[3]।।६६।।

हनुमाञ्शैलशृंगाणि शतशोऽथ सहस्रश:। ववर्ष कुंभकर्णस्य शरीरे वानरर्षभ:।।२४।।
तानि पर्वतशृंगाणि शूलेन परमाहवे। बिभेद परमायत्त: कुंभकर्णो मदोत्कट:।।२५।।
ततो हरीणां तदनीकमुग्रं दुद्राव शूलं निशितं प्रगृह्य।
तस्थौ च तस्यापतत: पुरस्थान्महीधराग्रं हनुमान्प्रगृह्य।।२६।।

हनुमंत शेपटीच्या साहाय्याने कुंभकर्णाची धांदल उडवितो : पहिलें पुच्छाचें करोनि रण। पाहूं कुंभकर्णाची आंगवण। नाटोपे तरी आपण। देवोनि उड्डाण निर्दळूं।।६७।। ऐसें विचारोनि हनुमंत। पुच्छाग्रें प्रेरितां पर्वत। वर्षे पर्वत शतानुशत। असंख्यात ते वेळां ।।६८।। शतानुशत पर्वत। पुच्छ लागवेगें वर्षत। तेणें कुंभकर्ण साशंकित। गिरि तोडित शूळहस्ते।।६९।। पर्वत सहस्रें सहस्र। तोडितां श्रमला निशाचर। झणाणिले त्याचे कर। कपि दुर्धर पुच्छाग्रें।।७०।। ऐसें त्याचें पुच्छ बळी। करोनि राक्षसां रवंदळी[4]। केली लंकेची पैं होळी। आतुर्बळी कपिपुच्छ।।७१।। पुच्छाग्रबळें जाण। केलें अखयाचें निर्दळण। इंद्रजितासीं रणीं गांजोन। करावया रण कपिपुच्छ।।७२।। कपिपुच्छ प्रतापवंत। धाक लाविला लंकेआत। निधडा[5] वीर हनुमंत। ऐसें निश्चित मानलें।।७३।। ऐसा कपिपुच्छाचा धाक। कुंभकर्णे घेतला देख। हनुमंत आला पैं संमुख। देवोनि हाक साटोपें।।७४।। जैसा अचळ गिरिवर। तैसा कुंभकर्णासमोर। उभा ठेला हनुमान वीर। शैलशिखर झेलीत।।७५।। कुंभकर्ण मदोन्मत्त। सैरा धांवे शूळहस्त। पुढें देखोन हनुमंत। साशंकित तो जाला।।७६।। हाणितां पुच्छाभिघात। कुंभकर्ण चांचरी[6] जात। झणाणिला शूळहस्त। शूळ गळत रणांगणीं।।७७।। शूळ रणीं गळोनि पडत। तेणें कुंभकर्ण क्रोधान्वित[7]। शूळ घेवोनि धांवत। रणीं हनुमंत मारावया।।७८।।

सशूलमाविध्य तडित्प्रकाशं गिरिर्यथा प्रज्वलिताग्रश्रृंगम्। स तेन वीरोभिहतस्तानांतरे।
स विह्वल: शोणितमुद्वमन्मुखात्।।२७।।
रणे बभासे हनुमान्महायशा यथातपांते सजलो बलाहक:।।२८।।

कुंभकर्णाचा हनुमंतावर शूळप्रहर : कुंभकर्णाची आंगवण। पहावया हनुमंत आपण। पुढें राहिला सावधान। मरण मारून प्रतापी।।७९।। याच्या अंगी किती शक्ती। घावो हाणील कैशा रीतीं। तें पाहावया मारुती। सावधवृत्तीं राहिला।।८०।। मारावया हनुमंत। कुंभकर्ण शूळहस्त। रागें रणरंगी गर्जत। स्वयें धांवत साटोपें।।८१।। जेंवी विजू धगधगित। तैसा शूळ सिंदूरार्चित। जैसा देदीप्यमान पर्वत। तैसा भासत महाशूळ।।८२।।

शूळप्रहार करताना कुंभकर्णालाच मूर्च्छा येते : घाव हाणितां कपींद्रा। शूळ न फुटेचि वानरा। भवंडी आली निशाचरा। पडे माघारा चांचरित।।८३।। पुढें अशुद्धातें[8] वमित। मूर्च्छापन्न हनुमंत। देखोनि कुंभकर्ण धांवत। कपीचा घात करावया।।८४।। हनुमंत अति विंदानीं[9]। कुंभकर्ण धरोनि चरणीं। गर्जत उठिला तो रणीं। गरगरोनि भवंडित।।८५।। क्षणैक भवंडी भूतळीं। क्षणैक भवंडी नभ:स्थळीं। हनुमान वीर महाबळी। चक्रानुमेंळीं भवंडिला।।८६।।

---

शब्दार्थ : १. मोठा नाश, घात, २. गळा, ३. तुलना करण्यास, ४. नाश, ५. अती बलाढ्य, ६. घेरी येऊ लागली. ७. क्रोधयुक्त, ८. रक्त, ९. पराक्रमी.

त्यासी टाकितां समुद्रजळीं। समुद्र लागेल नाभिमूळीं। आपटितां पैं भूतळीं। होईल रांगोळी पाताळा॥८७॥ यासी टाकितां अंबरी[१]। गिळील विमानांचिया हारी। त्यासी मारूं केशापरी। विचार करी हनुमंत॥८८॥ कुंभकर्णायेवढें धेंडे। उचलोनियां कैवाडें। हनुमान मानला रणसुरवाडें। वाडेंकोडें नाचत॥८९॥ श्रीराम संतोषोनि पूर्ण। सुग्रीवासी सांगे आपण। हनुमंताची आंगवण। रणविंदान पाहे पां॥९०॥

सुग्रीवाची उत्स्फूर्त उडी : ऐकतां श्रीरामवचन। सुग्रीवासी आलें स्फुरण। स्वयें करोनि उड्डाण। कुंभकर्ण हांकिला[२]॥९१॥ एकावरी दोघे जण। हा पुरुषार्थ नव्हे जाण। हनुमंतें कुंभकर्ण। स्वयें आपण सोडिला॥९२॥

हनुमंताचा संताप : जैसा होता स्वयें उचलिला। तैसाच तेथें उभा केला। निधडा हनुमंता दादुला। उडोनि आला श्रीरामापासीं॥९३॥ घालोंनियां लोटांगण। मस्तकी वंदोनियां चरण। हनुमंत कोपायमान। काय आपण बोलत॥९४॥ हनुमान म्हणे श्रीरामातें। धूरलक्षण नाहीं तूतें। काय उणें देखोनि मातें। सुग्रीवातें धाडिलें॥९५॥ नाहीं वीर्य धैर्य सांडिलें। नाहीं उणेपण मज आलें। सुग्रीवासी कोणें बोलें। त्वां धाडिलें श्रीरामा॥९६॥ धाडोनियां युद्धसंग्रामासीं। तुवां दिधलें आणिकासी। गाऱ्हाणें सांगूं कोणापासीं। उकसाबुकसीं स्फुंदत॥९७॥ देखोनि हनुमंताची व्यथा। कृपा आली श्रीरघुनाथा। आलिंगोनी एकात्मता। आश्वासिता होय त्यासी॥९८॥ हनुमंताच्या उदरांत। डोई घालोनि रघुनाथ। माझे अपराध समस्त। क्षमा निश्चित करीं बापा॥९९॥ पाहें हनुमंताचें रण। म्हणतां त्यासी आलें स्फुरण। मजही न पुसतां जाण। केलें उड्डाण सुग्रीवें॥१००॥ तुझी आण हनुमंता। सुग्रीव मज न पुसतां। रणीं आला साटोपता[३]। सत्य वार्ता हे माझी॥१॥ श्रीरामाच्या मृदु वचनीं। हनुमान लोळे गडबडोनी। त्रिसत्य[४] सत्य तुझी वाणी। वेदपुराणीं अति वंद्य॥२॥ हनुमान चरणीं ठेवोनि माथा। म्हणे सुखी जालो श्रीरघुनाथा। परिहार सुचो नको आतां। पुढील कथा अवधारीं॥३॥ एका जनार्दना शरण। हनुमंतकुंभकर्णरण। जाहलें दोहींचें संपूर्ण। पुढें निरूपण अवधारा॥१०४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमंतकुंभकर्ण युद्धवर्णनं नाम षड्विंशतितमोऽध्यायः॥२६॥ ॥ ओव्या॥१०४॥श्लोक॥२८ ॥एवं॥१३२॥

# अध्याय सत्ताविसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## कुंभकर्णावर सुग्रीवाचा विजय

स्वयें बोले श्रीरघुनंदन। सुग्रीव आणि कुंभकर्ण। दोघांसी मांडलेंसे रण। सावधान अवधारा॥

उत्पपात तदा वीरः सुग्रीवो वानराधिपः। सशालहस्तः सहसा समाविध्य महाबला॥१॥
अति दुद्राव वेगेन कुंभकर्णं महाबलम्। तमापतंतं संप्रेक्ष्य कुंभकर्णं प्लवंगमम्॥२॥
तस्थौ विवृत्तसर्वांगो वानरेंद्रस्य संमुखः। कुंभकर्णं स्थितं दृष्ट्वा। सुग्रीवो वाक्यमब्रवीत्॥३॥
विहताश्च त्वया वीराः कृतं कर्म सुदुष्करम्। सहस्वैकं निपातं मे शालवृक्षस्य राक्षस॥४॥

**हनुमंताच्या धर्मयुद्धनीतीमुळे कुंभकर्णाला आदर वाटतो :** सुग्रीव कपिराज आपण। लक्षोनियां

**शब्दार्थ :** १. आकाशात, २. हाक मारून बोलविला, ३. पराक्रमाने, ४. अगदी सत्य,

कुंभकर्ण। सवेग करोनि उड्डाण। आला गर्जोन शालहस्ती[१]॥२॥ कुंभकर्ण अति विस्मित। मज उचलोनि हनुमंत। होता गरगरां भोवंडित। तो कां न मारितां स्वयें गेला॥३॥ मज कुंभकर्णाची शक्ती। क्षणार्धें केली न[२] सरती[२]। निधडा[३] बळियाढा मारुती। धर्मस्थितीं रणयोद्धा॥४॥ एकावरी दोघे जण। श्रेष्ठीं करूं नये रण। तें धर्मशास्त्र प्रतिपाळून। स्वस्थ ठेवून मज गेला॥५॥ बळें भवंडितां आकाशीं। येतां देखोनि सुग्रीवासी। मज स्वस्थ ठेवोनि भूमीसीं। श्रीरामापासीं स्वयें गेला॥६॥ हा तंव नव्हे हनुमंत। सुग्रीवराजा अति विख्यात। याचा करीन मी घात। संग्रामात निमेषार्धे॥७॥

सुग्रीव व कुंभकर्णाचे परस्परांना आव्हान : ऐसें बोलोनि आपण। सुग्रीवातें अनुलक्षून। संमुख आला कुंभकर्ण। शूळ घेऊन साटोपें॥८॥ शूळहस्ती शालहस्ती। दोघे वीर भद्रजाती। येरयेरांतें निर्भर्त्सिती। स्वयें बोलती नोकोनी[४]॥९॥ संमुख देखोनि कुंभकर्ण। सुग्रीव स्वयें बोले आपण। नीचा कपीसीं करोनि कंदन। दादुलपण मिरविसी॥१०॥ आतां मी आलों शालहस्ती। किती आहे तुझी शक्ती । ते दाखवीं कां मजप्रती । रणव्युत्पत्ती विचारोनी ॥११॥ मी एकला शालहस्ती । श्रीरामसेवक भद्रजाती। तुझी करीन समाप्ती। रणव्युत्पत्ती महामारें॥१२॥ ऐकोनि सुग्रीववचन। हासोन बोले कुंभकर्ण। वीर न बोलती आंगवण। करोनि रण दाविती॥१३॥ जे कां बहुविध जल्पती। त्यांसी नाहीं संग्रामभक्ती। जरी तूं होसील पुरुषार्थी। करोनि ख्याती दावीं मज॥१४॥ सुग्रीवासीं करावया रण। कुंभकर्णा उल्लास पूर्ण। सरसावले दोघे जण। अति निर्वाण संग्रामीं॥१५॥

स कुंभकर्णस्य वचो निशम्य व्याविध्य शैलं सहसा मुमोच।
तेनाजघानोरसि कुंभकर्णं शैलेन शकाशनिसन्निभेन॥५॥
तच्छैलश्रृंगं सहसा प्रभग्नं। भुजांतरे तस्य तदा विशाले।
सशैलश्रृंगाभिहतश्चुकोप ननाद रोषाच्च विवृत्य वक्रम्॥६॥
विन्याध शूलं च तडित्प्रकाशं चिक्षेप हर्यृक्षपतेर्वधाय।
तत्कुंभकर्णस्य भुजप्रणुन्नं शूलं शितं कांचनदामजुष्टम्॥७॥
क्षिप्रं समुत्पत्य विगृह्य दोर्भ्यां। बभंज वीरस्तरसा बलेन॥८॥
कृतं मारसहस्रस्य शूलं कालयसं दृढम्। बभंज जानुमारोप्य संप्रहृष्टः प्लवंगमः॥९॥

सुग्रीव-कुंभकर्ण यांचे द्वंद्वयुद्ध : ऐकोनि कुंभकर्णवाक्यासी। कोप आला सुग्रीवासी। शूळ हाणितां आवेशीं। शालवृक्षीं त्यासी ठोकिलें॥१६॥ शाल लागतां भुजांतरी। शूळ पडिला धरेवरी। कुंभकर्णा आली घेरी। अर्धचंद्री लागली॥१७॥ विकळ जातां चांचरी। राक्षस मूर्च्छेतें सांवरी। शूळ घेवोनियां करीं। सुग्रीवावरी धांविन्नला॥१८॥ कुंभकर्णे अर्ध क्षणीं। वानरराज पाडिला रणीं। राक्षससैन्याचिया श्रेणी। आल्हादोनी गर्जती॥१९॥ शूळ ताडितां कोपेंकरीं। सुग्रीवबळाची पैं थोरी। उडोनि शूळ दोहीं करीं। वरिच्यावरी झेलिला॥२०॥ जैसें उंसाचें करबाड[५]। गुडघीं घालोनि मोडिती गोड। तैसा शूळ अति प्रचंड। केला दुखंड सुग्रीवें॥२१॥ शतत्रय[६] पुरुषांसी। शूळ नुचले अति आवेशीं। सुग्रीवें झेलोनि आकाशीं। जानुप्रदेशीं[७] मोडिला॥२२॥ निखळ[७] तिख्याचा धगधगित। तुळितां[८] भार शतानुशत। रत्नालंकारीं लखलखित। अत्यद्‌भुत महाशूळ॥२३॥ तोही वरच्यावरी झेलोनी। सुग्रीवें सांडिला मोडूनी। हरिखें[१०] श्रीरामनामवाणी। गर्जत रणीं महावीर॥२४॥ शूळ भंगिता सत्वर। स्वर्गीं नाचती सुरवर। सुग्रीवराजा महाथोर। कर्म दुर्धर स्वयें केलें॥२५॥

---

शब्दार्थ : १. शालवृक्ष हातांत घेऊन, २. तृच्छ, ३. अत्यंत शूर, ४. निर्भर्त्सना करून, ५. चिपाड, ६. तीनशे, ७. गुडघ्यांवर धरून, ८. केवळ, ९. तोलून पाहता, १०. आनंदाने.

स तं तदा भग्नमवेक्ष्य शूलं चुकोप रक्षोऽधिपतिर्महात्मा।
उत्पाट्य शृंगं सहसा गिरेस्तज्जघान सुग्रीवमभिप्रतर्दन्॥१०॥
स शैलशृंगाभिहतो विसंज्ञं पपात भूमौ युधि वानरेंद्रः।
तं प्रेक्ष्य भूमो पतितं विसंज्ञं नेदुः प्रहृष्टा युधि यातुधानाः॥११॥
ततस्तमासाद्य जगाम वीरं संस्तूयमानो युधि राक्षसौघैः।
शृण्वन्निनादं त्रिदिवालयानां प्लवंगराजग्रहविस्मितानाम्॥१२॥
ततस्तमादाय तदा स मेने हरींद्रमिंद्रोपममिंद्रवीर्यः।
अस्मिन्हते सर्वमिदं प्रशांतं सराघवं सैन्यमितींद्रशत्रुः॥१३॥

सुग्रीवाने शूळ मोडल्याबद्दल कुंभकर्ण विस्मित होतो : जेणें शूळें सुरासुर। यक्ष गंधर्व किन्नर। रणीं भंगिला अमरेंद्र। तो येणें सत्वर मोडिला॥२६॥ माझा शूळ अत्यद्‌भुत। झेलून भंगिला आकाशांत। तेणें कुंभकर्ण विस्मित। धन्य पुरुषार्थ सुग्रीवा॥२७॥ शूळ भंगिला महाथोर। तेणें कोपला निशाचर। घेवोनियां गिरिशिखर। सुग्रीवावरी टाकिलें॥२८॥

कुंभर्णाच्या गिरिशिखराच्या प्रहाराने सुग्रीव मूर्च्छित : सुग्रीव उडतां आकाशीं। शिखर आदळिलें उरासीं। मूर्च्छित पडिला भूमींसीं। संज्ञा[१] त्यासीं असेना॥२९॥ कुंभकर्णे अर्ध क्षणीं। वानरराजा पाडिला धरणीं। राक्षसवीरांची श्रेणी। उठली गर्जोनी जयजयकारें॥३०॥ वानरराजा रणांत। मज जाला हस्तगत। यश आलें अत्यद्‌भुत। रणीं डुल्लत कुंभकर्ण॥३१॥ सुग्रीव मारिला रणांत। वानरसेना हताहत। रामसौमित्र हनुमंत। तेही समस्त मारीन॥३२॥ मज विचरतां[२] रणाआंत। बापुडें मनुष्य रघुनाथ। मुख्य मारिल्या हनुमंत। रणकंदनार्थ संपला॥३३॥ यश मिरवावया रावणाजवळी। सुग्रीव वीर आतुर्बळी। स्वयें सुनी[३] काखेतळीं। निघे तत्काळीं लंकेसी॥३४॥ निशाणें त्राहाटिल्या[४] भेरी। भाट गर्जती कैवारीं। स्तुती करिती निशाचरी। लंकेमाझारी निघाला॥३५॥

विद्रुतां वाहिनीं दृष्ट्वा वानराणां ततस्ततः। कुंभकर्णेन सुग्रीवं गृहीतं चापि वानरम्॥१४॥
हनुमांश्चिंतयामास मतिमान्मारुतात्मजः। एवं गृहीते सुग्रवे किं कार्यं वै मया भवेत्॥१५॥
यत्तु न्याय्यं मया कर्तुं तत्करिष्यामि सर्वथा। भूत्वा पर्वतसंकाशो नाशयिष्यामि राक्षसम्॥१६॥
मया विमोक्षितस्यास्य सुग्रीवस्य महात्मनः। अप्रीतिश्च भवेत्कष्टा कीर्तिनाशश्च शाश्वतः॥१७॥

वानरसैन्यांत कल्लोळ व हनुमंताची विचारसरणी : कुंभकर्णे रणाभिनिवेशीं[५]। धरोनि नेतां सुग्रीवासी। प्रळय मांडिला वानरांसीं। पळती चौपासीं किरकिरत॥३६॥ तें देखोनि हनुमंत। स्वयें उठिला बळान्वित। सोडवावया वानरनाथ। असे गर्जत साटोपें॥३७॥ धरोनि नेतां मुख्य धुर। उगेच पाहती वानर। तैसा नव्हे मी किंकर[६]। करीन उद्धार स्वामिकार्याचा॥३८॥ हाणोनि मुष्टिघात। सोडवीन कपिनाथ। कुंभकर्णाचा करीन घात। असे गर्जत साटोपें॥३९॥ मारोनिया कुंभकर्णासीं। म्यां न सोडवितां सुग्रीवासी। परम अपकीर्ति रायासी। प्राण लाजेसी सांडील॥४०॥ रणीं मारितां कुंभकर्ण। मज न लागे अर्ध क्षण। लाजें सुग्रीव सांडील प्राण। यालागी आपण स्थिर व्हावें॥४१॥

श्रीराम सहमत : संज्ञा सांगे रघुनंदन। सुग्रीव स्वांगें आपण। करील आपली सोडवण। तुम्ही आंगवण न करावी॥४२॥ तुम्ही करिता पुरुषार्थ। राक्षस त्याचा करितील घात।

शब्दार्थ : १. शुद्धी, २. भिडतां, ३. घालून, ४. वाजविल्या, ५. लढाईत चिकाटी धरून, ६. सेवक.

तेंव्हा होईल अनर्थ। उगे स्वस्थ रहा येथें।।४३।। ऐसें सांगतां रघुनाथ। वानरवीर निवांत। उगा राहिला हनुमंत। पुढील कार्यार्थ अवधारा।।४४।।

लंकामार्गात कुंभकर्णास अपशकुन : लंके जाता कुंभकर्ण। त्यासीं होती अपशकुन। आडवे जाती बिडालगण[1]। करिती रुदन म्यांव शब्दे।।४५।।

स कुंभकर्णोऽथ विवेक लंकां। स्फुरंतमादाय महाहरिं तम्।
विमानचर्यागृहगोपुरस्थैः। पुष्पाग्र्यवर्षैरभिपूज्यमानः।।१८।।
ततः स संज्ञा प्रतिलभ्य कृच्छ्राद्बलीयसस्तस्य भुजांतरस्तथः।
अवेक्षमाणः पुरराजमार्गं। विचिंतयामास मुहुर्महात्मा।।१९।।
एवं गृहीतेन कथं नु नाम। शक्यं मया संप्रति कर्तुमद्य।
तथा करिष्यामि यथा हरीणां। भविष्यतीष्टं मम चैव पथ्यम् ।।२०।।
ततः कराग्रैः सहसोर्ध्वमित्य राजा हरीणाममरेंद्रशत्रोः।
चकर्त कर्णौ दशनैश्च नासां। ददार पार्श्वेषु च कुंभकर्णम् ।।२१।।

कुंभकर्णाचे लंकावासीयांकडून अभिनंदन : सुग्रीव धरिला कपिनाथ। महायशें मदोन्मत्त। कुंभकर्ण लंकेआंत। असे जात उल्लासें।।४६।। लंकामंदिरें विमानाकारी। त्यांवरी राहूनि नरनारीं। हर्षे कुंभकर्णावरी। सुमनधारीं[2] वर्षती।।४७।। घरोघरींच्या नारी उल्लासीं। अक्षता टाकोनियां शिर्शी। ओंवाळिती कुंभकर्णासी। विजयाभिनिवेशीं जातसे।।४८।। बिभीषणाची निजकांता। जे कां परम पतिव्रता। तिणें कुंभकर्ण ओवाळितां। विपरीतता तेथें जाली।।४९।।

कुंभकर्णावर टाकलेल्या अक्षता सुग्रीवावर पडून सुग्रीव सावध होतो : कुंभकर्ण उंच भारी। अक्षता[3] न वचती[3] तेथवरी। त्या पडिल्या सुग्रीवाच्या शिरीं। म्हणे झडकरी विजयी होईं।।५०।। पतिव्रतेचे वचन। सुग्रीवासी फळले पूर्ण। मूर्च्छा जावोनि संपूर्ण। सावधान स्वयें जाला।।५१।।

कुंभकर्णाच्या जयोन्मादात सुग्रीव त्याचे नाक व कान तोडतो : कुंभकर्णाचे काखेभीतरीं। धरोनि आणिले लंकापुरीं। सुटका होय कैशापरी। ऐसें विचारी सुग्रीव।।५२।। श्रीरामनामा या आवर्तीं[4]। सकळ श्रमांची निवृत्ती[5]। तत्काळ होय बंधमुक्ती। तें स्मरे चित्तीं सुग्रीव।।५३।। करितां रामनामस्मरण। सुग्रीव सुटला संपूर्ण। विटंबावया कुंभकर्ण। स्वयें आपण विचारी।।५४।। निघोनियां काखेबाहेरी। बैसोनि त्याच्या उरावरी। नाका कानां केली बोहरी[6]। तेही परी अवधारा।।५५।। मदोन्मत्त बळोन्मत्त। राजोन्मत्त गर्वोन्मत्त। विजयोन्मत्त महामत्त। पंचोन्मत्त कुंभकर्ण।।५६।। पंचोन्मत्ताची पैं भुली। सुग्रीव सुटला काखेतळीं। कुंभकर्णा नाठवे ते काळीं। विजयोन्मेळीं उन्मत्त।।५७।।

कुंभकर्णाचे नाक व कान घेऊन सुग्रीवाचे उड्डाण : सुग्रीव बैसोनि उरेंसी[7]। नखीं छेदिलें नाकासी। दांतीं छेदिलें कानासी। गेला आकाशीं उडोनी।।५८।। पंचोन्मत्त आवेशीं। देह नाठवे कुंभकर्णासी। विटंबिलें नाककानांसी। हें तयासी स्मरेना।।५९।।

स कुंभकर्णो हृतकर्णनासो। भृशं नदन्वेदनयान्वितश्च।
रोषाभिभूत : क्षतजार्द्रगात्रः। सुग्रीवमाविध्य पिपेष भूमौ।।२२।।
स भूतले भूरिबलेन पिष्टः। सुरारिभिस्तैरभिहन्यमानः।
जगाम खं कंतुकवज्जवेन। पुनश्च रामं सहसा जगाम।।२३।।

शब्दार्थ : १. मांजरे, २. पुष्पवृष्टीने, ३. जाऊ शकत ना. ४ घोषाने पठनाने, ५. परिहार, ६. नाश, ७. उरावर.

नाक कापोनि दोहीं हातीं। कान छेदोनियां दांतीं। गगना उसळला कपिपती। हें नेणे निश्चितीं कुंभकर्ण।।६०।।

कुंभकर्णाचे विद्रुप रूप पाहून लंकाजनांचा विषाद : जेंवी मद्यपी[१] विसरे शरीर। तेंवी देह विसरे निशाचर। काय करोनि गेला वानर। न कळे विचार कुंभकर्णा।।६१।। यशोमदें डुल्लत। लंकेमाजी असे जात। नाककानां जाला घात। नेणे वृत्तांत कुंभकर्ण।।६२।। कुंभप्राय[२] वाटोळे कान। यालागीं नांव कुंभकर्ण। वानरें छेदिले ते श्रवण[३]। आतां विकर्ण शोभत।।६३।। स्वर्गी सुरवरीं पिटिली टाळी। बाप सुग्रीव आतुर्बळी। निष्टोनियां काखेतळीं। केली होळी नाककानां।।६४।। सुग्रीव उसळोनी गगना। तेथून सांडिता नाककानां। दडपोनि राक्षसांची सेना। मुकली प्राणा लक्षांत।।६५।। कुंभकर्णनाकाची बोहरी। धाड आली लंकेवरी। बोंब सुटली घरोघरीं। राक्षसहारी निमाल्या।।६६।। छेदोनियां नाककान। सुग्रीवें करोनि उड्डाण। श्रीरामाचे ठाकिले चरण। यशस्वी पूर्ण कपिनाथ।।६७।।

सुग्रीवाच्या आगमनाने रामांना व वानर सैन्याला हर्ष : सुग्रीव येवोनि आपण। घालोनियां लोटांगण। वंदिता श्रीरामाचे चरण। केलें गर्जन वानरीं।।६८।। निशाणे त्राहाटिल्या भेरी। गुढिया उभविल्या वानरीं। रामनामाच्या गजरीं। जयजयकारीं गर्जती।।६९।। आमुचा राजा बळिवंत। कुंभकर्ण बळोन्मत्त। त्याच्या नाककानां करोनि घात। विजयान्वित स्वयें आला।।७०।।

सुग्रीवाचे निवेदन व रामनामाचा महिमा कथन : स्वयें सुग्रीव सांगे आपण। श्रीरामा ऐकें सावधान। वृथा आमची आंगवण। तुजवीण रघुनाथ।।७१।। कुंभकर्णे धरितां जाण। निःशेष जाता माझा प्राण। आठवताचि नामस्मरण। आलें स्फुरण मज तेव्हां।।७२।। रामनामाच्या बळापुढें। राक्षसबळ तें बापुडें। मशक मानूं घुंगरडें। मज बळ गाढें[४] रामाचें।।७३।। रामनामबळें जाण। त्याचे छेदिले नाक कान। नामें पावलों तुझे चरण। विजयी संपूर्ण रामनामें।।७४।। नामापासीं यश कीर्ती। नामापासीं विजयवृत्ती। नामापासीं भुक्ति मुक्ती। रामनाम स्मरती ते धन्य।।७५।। धन्य श्रीरामाचे चरण। धन्य श्रीरामाचें दर्शन। धन्य श्रीरामाचें स्मरण। बंदिमोचन रामनामें।।७६।। धन्य श्रीरामाची कीर्ती। धन्य श्रीरामभजनभक्ती। धन्य श्रीरामनित्यानुवृत्ती। नाम स्मरती ते धन्य।।७७।। नामासीं नाहीं विधिविधान। नामासी न लागे कर्मबंधन। नामचि दासासीं अनुष्ठान। नाम परिपूर्ण परब्रह्म।।७८।। नामासी न लागे सूतक। नाम भस्म करी पातक। नाम सर्वथा नित्य निर्दोख। सरतें सुख रामनामें।।७९।। नामासीं नाहीं अनाध्यावो[५]।। नामस्मरणी नित्य स्वाध्यावो[६]। नाम स्मरती ते सभाग्य पहा हो। नाम स्वयमेव परब्रह्म।।८०।। ऐसें बोलतां सुग्रीवासीं। प्रेम ओसंडलें श्रीरामासीं। आलिंगोनियां हृदयासीं। आपणापासीं बैसविला।।८१।।

हनुमंताची सुग्रीव क्षमा मागतो : जीवापरीस परम आप्त। सुग्रीवा मानी श्रीरघुनाथ। तोही उठोनिया त्वरीत। चरण धरित हनुमंताचे।।८२।। माझे अपराध समस्त। क्षमा करावे त्वां निश्चित। म्यां केलें गा जें उद्धत[७]। तें सावचित्त अवधारीं।।८३।। तुझिया संग्रामाआड। मी आलों गा महामूढ। विचार न करितां दृढ। केला कैवाड संग्राम।।८४।। तुझिया संग्रामा अभक्ती। मी पावलों बंधनप्राप्ती। सुटलों रामनामानुवृत्तीं[८] क्षमा मारुति मज कीजे।।८५।। मी सुग्रीव प्रतापराशी[९]। केंवी सांपडें कुंभकर्णासी। तुझिया संग्राविक्षेपासीं[१०]। मी त्यापासीं

शब्दार्थ : १. दारूबाज, २. मडक्याप्रमाणे, ३. कान, ४. मोठे, ५. बंदी, सुटी, ६. अभ्यास करण्याचा दिवस, ७. अडाणीपणा, ८. रामनामस्मरणाने, ९. मोठा पराक्रमी, १०. लढाईत आडकाठी आणल्यामुळे.

अडकलों ॥८६॥ तेव्हां आठवावया श्रीरघुनाथ। हनुमानसद्‌गुरुकृपा समर्थ। येणें जालों नित्यमुक्त। जाण निश्चित कपिवर्या ॥८७॥ तुवां भेटविला श्रीरघुनाथ। तूं गुरु आम्ही शिष्य समस्त। जें जें केलें म्यां उद्धत। क्षमा समस्त मज कीजे ॥८८॥

हनुमंताचे परिवर्तन : ऐकोनी सुग्रीवाचें वचन। हनुमान घाली लोटांगण। येरें दिधलें आलिंगन। समाधान श्रीरामें ॥८९॥ दोघांचें गेले गुणागुण। दोघां नाठवे दोनपण। एका जनार्दना शरण। कृपा पूर्ण श्रीरामाची ॥९०॥ करितां रामनाम स्मरण। सुग्रीवें विटंबिला कुंभकर्ण। एका जनार्दना शरण। गोड निरूपण पुढें आहे ॥९१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सुग्रीवकुंभकर्णयुद्धे सुग्रीवविजयप्राप्तिर्नाम सप्तविंशतितमोऽध्यायः ॥२७॥ ओंव्या ॥ ९१॥ श्लोक॥ २३॥ एवं संख्या ॥११४॥

## अध्याय अठ्ठाविसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### कुंभकर्णवध

स्वतःची विद्रूपता समजल्यावर कुंभकर्णाचा खेद व संताप : कुंभकर्णा लावोनि ख्याती। सुग्रीव पावोनि विजयवृत्ती[1]। स्वयें आला श्रीरामाप्रती। वानर गर्जती उल्लासे ॥१॥ येरीकडे कुंभकर्ण। विजयोल्लासें आपण। लंकेसीं जातसे जाण। दशानन वंदावया ॥२॥ हांसती लंकेचे जन। हारवोनियां नाक कान। विजय मिरवितो आपण। काळें वदन कुंभकर्णा ॥३॥ कुंभकर्ण अति उन्मत्त। नाककानां झाला घात। कोणी सांगों न शके मात। तेणें लंकानाथ अति दुःखी ॥४॥ शत्रु मर्दील कुंभकर्ण। ऐसा भरंवसा होता पूर्ण। शेखीं[2] हरवोनि नाककान। आला आपण फेंपात ॥५॥ सुग्रीवें छेदिले नाककान। हें कुंभकर्णा व्हावया ज्ञान। दीर्घ काष्ठीं आरसा बांधोन। दावी रावण कुंभकर्णा ॥६॥ आरसा देखतां संमुख। आरशासीं भांडे देख। नापितहस्तें तूं काळमुख। मज निर्नासिक दाविसी ॥७॥ हातें पाहों जाता स्पष्ट। नाक कान सरसपाट। सुग्रीवें केलें यथेष्ट। अहा कटकट कुंभकर्णा ॥८॥ सुग्रीव पाहतां काखेतळीं। तेणें सुटोनि तेचि काळीं। नाककानां करोनि होळी। श्रीरामाजवळी तो गेला ॥९॥ जळो माझी रणव्युत्पत्ती[3]। सन्मुखपणें विजयवृत्ती। कीर्ति जाली अपकीर्ती। केंवी लंकापती मुख दावूं ॥१०॥ हारवोनि नाककान। केंवी वंदूं दशानन। कोपें परतला कुंभकर्ण। वानरसैन्य निर्दळावया ॥११॥

कर्णनासाविहीनस्तु कुंभकर्णो महाबलः। रराज शोणितोत्सेकैर्गिरिः प्रस्रवणैरिव ॥१॥
पुनः स पुर्याः सहसा महात्मा निष्क्रम्य तद्वानरसैन्यमुग्रम् ।
बभक्ष रक्षो युधि कुंभकर्णः प्रजा युगांताग्नीरिव प्रदीप्तः ॥२॥
बुभुक्षितः शोणितमांसगृध्नुः प्रविश्य तद्वानरसैन्यमाशु ।
चखाद रक्षांसि हरीन्पिशाचानृक्षांश्च मोहाद्युधि कुंभकर्णः ॥३॥
एवं द्वौ त्रीन्बहूंश्चापि वानरान्सराक्षसैः सह। समादायैकहस्तेन मुखे प्रक्षिपति स्म सः ॥४॥

संतापातिरेकामुळे कुंभकर्णाचे विवेकशून्य वर्तन : सुग्रीवें नेले नाककान। अपमानिला कुंभकर्ण। कोपें परतला आपण। वानरगण मारावया ॥१२॥ नाकीं कानीं रुधिरधारा। रक्तें

शब्दार्थ : १. विजय प्राप्ती, २. शेवटी, ३. रण कौशल्य.

न्हाणिलें निशाचरा। गेरु[1] शोभे जेंवी गिरिवरा। तेंवी साजिरा रणीं दिसे ॥१३॥ सांडोनियां लंकाभवन। केलें कुंभकर्णे उड्डान। मर्दुनियां वानरगण। स्वयें आपण भक्षित ॥१४॥ वटारोनियां दोनी नयन। पसरोनियां दीर्घ वदन। भक्षीतसे वानरगण। कुंभकर्ण आक्रोशें ॥१५॥ एक दोन तीन चोरी। वानरसैन्याचिया हारी[2]। राक्षससैन्या त्याचि परी। मुखाभीतरी घालीत ॥१६॥ रणीं मातला अति दुर्धर। त्यासीं नाठवे आपपर। वानर आणि निशाचर। भक्षी एकत्र समसगट ॥१७॥ प्रळयकाळीं हुताशन[3]। सर्व भक्षिता होय आपण। तेंवी वानररक्षोगण[4]। कुंभकर्ण भक्षित ॥१८॥ मांस खावया येती भूतें। कुंभकर्ण भक्षी त्यांते। पिशाचें कंकाळें समस्तें। अस्वलांतें भक्षित ॥१९॥

ते वध्यमाना हरयो रामं जग्मुः सतां गतिम्। राघवश्च समुत्पत्य धनुरुग्रं समाददे ॥५॥
स वानरगणैस्तैस्तु वृतः परपुरंजयः। लक्ष्मणानुगतो रामः संप्रतस्थे महाबलः ॥६॥

**श्रीरामांचें प्रतिकारार्थ आगमन :** वृक्षशिळापर्वत पाषाण। वानरीं युद्ध करितां निर्वाण। रणीं नागवे कुंभकर्ण। आले धांवोन श्रीरामापाशीं ॥२०॥ कुंभकर्ण नार्केविण। रणीं वानरां करितां कंदन[5]। देखोनि कोपला रघुनंदन। धनुष्यबाण सज्जूनी ॥२१॥ सुवर्णबंदी अति सुंदर। मणिरत्नांकित मनोहर। पाचूबंद परिकर[6]। चाप गंभीर शोभत ॥२२॥ ऐसिया सज्जोनियां धनुष्यासी। वानर घालोनि पाठींसीं। राम खवळला रणाभिनिवेशीं। कुंभकर्णासी निघटावया ॥२३॥

**बिभीषणाची श्रीरामांना विनंती :** श्रीरामें सज्जोनियां मेढा[7]। उभा कुंभकर्णापुढां। राम नेटकां[8] धनुर्वाडा। मागां पुढां हालों नेदी ॥२४॥ दोहीं बाहीं वानरगण। निकटवर्ती[9] लक्ष्मण। रणीं क्षोभतां रघुनंदन। बिभीषण धांविन्नला ॥२५॥ घालोनियां लोटांगण। वंदोनि श्रीरामचरण। मृदु मंजुळ मधुर वचन। बिभीषण विनवीत ॥२६॥ कुंभकर्णा आवडी मोठी। त्याची घेवोनियां भेटी। जंव मी सांगेन जीवींच्या गोष्टी। तंव शरवृष्टी न करावी ॥२७॥ निवारून वानरगणा। युद्ध ठेवोनि अर्ध क्षणा। भेटावया कुंभकर्णा। आज्ञापना मज द्यावें ॥२८॥ कृपेनें बोले रघुनाथ। कुंभकर्ण अति उन्मत्त। रागें करील तुझा घात। कुळक्षयार्थ वाढेल ॥२९॥ ऐकतां श्रीराम वचन। बिभीषणा आलें रुदन। प्रेम देखोनि रघुनंदन। आज्ञापन दीधलें ॥३०॥

बिभीषणः पुरो दृष्ट्वा मालिनीय लघुः सदा। करुणाक्रोधलज्जाभिर्व्याप्तो विह्वलतां गतः ॥७॥
बिभीषणो महाबाहुः कुंभकर्णमुवाच ह। गदितं मे कुलस्यास्य रक्षणार्थमरिंदम ॥८॥
न कृतं सर्वरक्षोभिस्तस्तोऽहं राममागतः। क्षमितव्यं तु भवता सुकृतं दुष्कृतं तु वा ॥९॥
एवमुक्त्वाश्रुपूर्णाक्षो गदापाणिर्बिभीषणः। एकांतमाश्रितो भूत्वा चिंतयामास तत्क्षयम् ॥१०॥

**कुंभकर्ण व बिभीषण यांची भेट :** संमुख देखोनि बिभीषण। कुंभकर्णा आलें रुदन। बाळपणापासून प्रतिपालन। येणें केलें ॥३१॥ माता पिता धाय[10] धाता[11]। त्याहून त्याची अधिक प्रेमता। त्यासी रावणें हाणितां लाता। अति विव्हलता स्फुंदत ॥३२॥ देखोनि कुंभकर्णाचें रुदन। स्वयें बोले बिभीषण। कुळरक्षणाथ आपण। स्वहित संपूर्ण सांगितलें ॥३३॥ हा सविवेक प्रपंचहिता। हाचि हितार्थ परमार्था। त्यासी रावणें हाणितल्या लाथा। दुःखावस्था स्फुंदत ॥३४॥ ते स्वहिताची माझी मात। नायके इंद्रजित लंकानाथ। प्रधान परिवार समस्त। शेखीं प्रहस्त नायके ॥३५॥ लाथा हाणिल्या सभेप्रती। मज क्षोभ[12] चढला नाहीं चित्तीं। बलात्कारें धरोनि हातीं। श्रीरामाप्रती दवडिलें ॥३६॥ यालागीं गा आपण।

**शब्दार्थ :** १. काव, २. समुदाय, ३. अग्नी, ४. वानर आणि राक्षस यांचे समुदाय., ५. युद्ध, लढाई, ६. सुंदर, ७. धनुष्य, ८. उत्तम , ९. जवळ असणारा, १०. दाई, ११. पोषण करणारा, १२. राग, क्रोध.

श्रीरामासीं आलों शरण। माझे अपराध जे दारुण। क्षमा संपूर्ण करावे ॥३७॥ ऐकतां बिभीषणवचन। कुंभकर्णा आलें रुदन। दोघां पडिलें आलिंगन। स्रवती नयन दोघांचे ॥३८॥ बिभीषण धरोनि हातीं। कुंभकर्णो नेला एकांती। वैर करितां रघुपती। कुळसमाप्ती कुळाक्षयो ॥३९॥ देखोनियां अति एकांत। कुंभकर्ण सांगे अति भावार्थ। बिभीषणा तुझें भाग्य समर्थ। श्रीरघुनाथ पावलासी ॥४०॥ करितां जप तप ध्यान। योगायोग अनुष्ठान। स्वप्नीं न दिसे रघुनंदन। तो सुप्रसन्न तुज जाला ॥४१॥

आत्मकार्यं कृतं वत्स यस्त्वं राममुपागतः। त्वमेको रक्षसां लोके सत्यधर्माभिरक्षितः ॥११॥
नास्ति सत्याभिसक्तानां व्यसनं तु कदाचन। संतानार्थं त्वमेवैकः कुलस्यास्य भविष्यसि ॥१२॥
राघवस्य प्रसादाच्च रक्षसां राज्यमाप्स्यसि। प्रकृत्याहं सुदुर्धर्षः शीघ्रं मार्गादपक्रम ॥१३॥
न स्थातव्यं पुरस्तान्मे संभ्रमाद्भ्रष्टचेतसः। न वेद्मि संयुगे सक्तः स्वान्परान्वा निशाचर ॥१४॥
रक्षणीयोऽसि मे वत्स सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥१५॥

**कुंभकर्ण रामाच्या हातून मरणाची इच्छा व्यक्त करतो :** दोघां बंधूंचा एकांत। कुंभकर्ण सांगे भावार्थ। पूर्णावतार श्रीरघुनाथ। निश्चितार्थ मी जाणें ॥४२॥ नारदवाक्याच्या निर्धारीं। श्रीराम अवतारां अवतारी। त्यासी पहातां वैराकारीं[1]। करील बोहरी[2] कुळाची ॥ ४३॥ श्रीराम वैरी करितां जाण। सुपुत्र ससैन्यप्रधान। क्षय पावेल रावण। हेंही संपूर्ण मी जाणे ॥४४॥ तुवां थोर केलें उचित। होवोनि श्रीरामा शरणागत। कुळ तारिलें निश्चितार्थ। आम्ही समस्त उद्धरिलों ॥४५॥ राक्षसांच्या कुळाप्रती। बिभीषणा तूं भावार्थी। तुझ्या ठायीं श्रीरामभक्ती। परम परमार्थी तूं एक ॥४६॥ राक्षसकुळीं धर्मभूषण। सत्यानुवर्ती[3] बिभीषण। तुझ्या धर्माचें निशाण। वैकुंठी जाण गाजत ॥४७॥ ज्याच्या ठायीं श्रीरामभक्ती। त्यास भय नाहीं कल्पांती। कळिकाळ शरण येती। पायां लागती महाविघ्नें ॥४८॥ रणीं खवळला श्रीरघुनाथ। करील राक्षसांचा घात। मजसगट लंकानाथ। कुळ समस्त निर्दाळील ॥४९॥ रिघोन श्रीरामासीं शरण। राक्षसकुळा संरक्षण। तूं वांचलासी बिभीषण। तिळतर्पण पिंडदाना ॥५०॥ तुझें भाग्य अति समर्थ। तुज तुष्टला श्रीरघुनाथ। लंकाराज्य होईल प्राप्त। जाण निश्चित बिभीषणा ॥५१॥ धन्य प्रतापी रघुनंदन। न[4] जिणतां[4] दशानन। लंकाराज्य दिधलें दान। अन्यथा[5] कोण करूं शके ॥५२॥ आम्हीं जोडिला लौकिकार्थ। दादुगेपणाचा[6] पुरुषार्थ। तुवां जोडिला श्रीरघुनाथ। निजमोक्षार्थ राक्षसां ॥५३॥ लागतां श्रीरामाचे बाण। मी पावेन ब्रह्म पूर्ण। परम उल्लासें आपण। कुंभकर्ण अनुवादे ॥५४॥ घालोनियां लोटांगण। वंदून बिभीषणाचे चरण। श्रीरामासीं करावया रण। आज्ञापन मज देईं ॥५५॥

**कुंभकर्णाचा बिभीषणाला निरोप व रणभूमीवर आगमन :** मज कोप आल्या घोरांदर[7]। युद्धीं नाठवे आपपर। तूं येथोनि परता सर। आम्ही निशाचर अविवेकी ॥५६॥ आम्ही राक्षस अति उन्मत्त। संमुख तुजला असतां येथ। अवचट होईल अनर्थ। नीघ निश्चित सुबंधो ॥५७॥ तूं श्रीरामाचा शरणागत। तुज मारणें नाहीं येथ। जवळी असतां होईल अनर्थ। नीघ निश्चित सभाग्या ॥५८॥ ठाकूनि जाईं श्रीरघुनाथ। तेथें तुज न लागे आघात। ऐसें बोलोनि कुंभकेत। रणाआंत निघाला ॥५९॥

मर्दंतं वानरान्संख्ये कालांतकयमोपमम्। तं दृष्ट्वा राक्षसश्रेष्ठं प्रदीप्तानलवर्चसम् ॥१६॥
विस्फारयामास तदा कार्मुकं पुरुषर्षभः। स तस्य चापनिर्घोषात्कुपितो नैर्ऋतर्षभ ॥१७॥
अमृष्यमाणस्तं घोषामभिदुद्राव राघवम्। तस्मिन्काले सुमित्रायाः पुत्रः परबलार्दनः ॥१८॥

शब्दार्थ : १. शत्रुत्वेकरून, २. नाश, ३. सत्यधर्मानें वागणारा, ४. जिंकल्यावाचून, ५. उलट, ६. शूरत्वाचा, ७. भयंकर.

चकार लक्ष्मण: क्रुद्धो युद्धं शस्त्रविदां वर:। स कुंभकर्णस्य शराञ्शरीरे सप्त वीर्यवान्॥१९॥
निचखानाददे चान्यान्विससर्ज स लक्ष्मण:। अतिक्रम्य स सौमित्रिं कुंभकर्णो महाबल:॥२०॥
राममेवाभिदुद्राव कंपयन्निव मेदिनीम्॥२१॥

कुंभकर्णाच्या आगमनामुळे वानरसैन्य भयभीत : जैसा काळ भूतां आंकळित[1]। कां यम यमपाशीं बांधित। अंतक सगळाचि गिळित। तेंवी वानरांतें कुंभकर्ण॥६०॥ जेंवी वन्ही[2] वनाआंत। वनस्थळी भस्म करित। तेंवी कुंभकर्ण वानरांत। कंदन[3] करित कपिकुळा॥६१॥

रामधनुष्याच्या टणत्काराने कुंभकर्ण दचकला : करित वानरां मर्दन[3]। येतां देखोनि कुंभकर्ण। तेणें क्षोभला रघुनंदनें। धनुष्यबाण सज्जूनी॥६२॥ करित धनुर्ष्यीं टणत्कार। नादें दुमदुमिलें अंबर। कुंभकर्णाचें जिव्हार[4]। अति दुर्धर दचकलें॥६३॥ ऐकोनि चापगर्जन। कोपें खवळला कुंभकर्ण। लक्षूनियां रघुनंदन। सवेग आपण धांविन्नला॥६४॥

कुंभकर्ण रागाने रामांवर चालून जात असता लक्ष्मण मध्ये येतो : धावोनि येतां कुंभकर्ण। आडवा आला लक्ष्मण। धनुष्य सज्जोनि संपूर्ण। सात बाण विंधिले॥ ६५॥ लागतांही सात बाण। डंडळीना[5] कुंभकर्ण। तें देखोनि लक्ष्मण। बाण दारुण विंधिले॥६६॥ अव्हेरून त्याचे बाण। उपेक्षोनियां लक्ष्मण। लक्षूनियां रघुनंदन। कुंभकर्ण धावला॥६७॥

कुंभकर्णो महातेजा राघवं वाक्यमब्रवीत्। नाहं विरोधो विज्ञेयो न कबन्ध: खरो न च॥२२॥
न वाली न च मारीच: कुंभकर्णमवैहि माम्। पश्य मे मुद्गरं घोरं सर्वकालायसं दृढम्॥२३॥
अमेन निर्जिता देवा दानवाश्च मया रणे। शक्रश्च निर्जितो राम नष्टाहं च स्वयंभुव:॥२४॥
विकर्णनास इति मां नावज्ञातुमिहार्हसि। अल्पापि हि न मे पीडा कर्णनासाविकर्तनात्॥२५॥

लक्ष्मणाला अव्हेरून कुंभकर्णाची रामांना दार्पोक्ती : श्रीरामाची आंगवण। नोकोनि[6] बोले कुंभकर्ण । रणीं मारिले रक्षोगण। ते उपेक्षून अनुवादे॥६८॥ विराध नव्हे मी वनगोचर। त्रिशिरा दूषण नव्हे मी खर। मी तंव नव्हें वाळी वानर। दुश्चित्ता[7] शर विंधावया॥६९॥ कबंध नव्हें मी पायेंवीण। मारीच नव्हें मी कनकहरिण। माझें नांव कुंभकर्ण। रामलक्ष्मण मर्दावया॥७०॥ माझे हातींचा मुद्गर। तिखट तिख्याचा दुर्धर। येणें जिंतिलें सुरासुर। यक्ष किन्नर पन्नग[8]॥७१॥ दैत्य दानव मानव। येणें जिंतिलें म्यां सर्व। रणीं मारावया राघव। घेवोनि धांव आलों असें॥७२॥ इंद्र धरिला जीवें जीत। तो मी ब्रह्मयाचा नात। नाककानां जाला घात। उपेक्षित न मानावा॥७३॥ नाककानांची हे व्यथा। अल्प बाधीना माझ्या चित्ता। उणीव नव्हेच पुरुषार्था। रणीं रघुनाथा मर्दीन॥७४॥

कुंभकर्ण मुद्गरानें श्रीरामांवर प्रहार करतो : ऐकोनि कुंभकर्णवचन। रामें विंधिले दुर्धर बाण। तेणें न ढळे कुंभकर्ण। मग निर्वाण मांडिलें॥७५॥ रामें विंधितां रुद्रास्त्र। त्याचे हृदयीं भेदला शर। अति विव्हळ निशाचर। हातींचा मुद्गर[9] गळाला॥७६॥ मुद्गर पडतांचि क्षिती[10]। कोपें खवळला भद्रजाती। तोचि मागुता घेवोनि हातीं। श्रीरामाप्रती धांविन्नला॥७७॥ रणीं मर्दीत वानर। आपुले भक्षी राक्षसभार। गिळित अश्व खर[11] कुंजर[12]। आपपर नोळखे॥७८॥ रणीं मातला निशाचर। नोळखे आपपर। मारावया श्रीरामचंद्र। घेवोनि मुद्गर धांविन्नला॥७९॥ मुद्गरेंसीं घेवोनि धांव। निकट ठाकिला राघव। तो जंव हाणीं घाव। केलें लाघव श्रीरामें॥८०॥

दर्शयेक्ष्वाकुशार्दूल वीर्यं गात्रेषु मेऽनघ। ततस्त्वां भक्षयिष्यामि दृष्टपौरुषविक्रमम्॥२६॥

शब्दार्थ : १. दाबांत ठेवतो, २. अग्नी, ३. नाश, ४. अंत:करण, ५. भ्याला नाही. ६. धिक्कारून, ७. असावधाला, ८. सर्प, ९. शस्त्रविशेष, मुसळ, १०. जमिनीवर, ११. गाढव, १२. हत्ती.

वायव्यमादाय ततो महास्त्रं रामः प्रचिक्षेप निशाचराय।
समुद्गरं तेन जहार बाहुं निकृत्तबाहुस्तुमुलं ननाद॥२७॥
स कुंभकर्णोऽस्त्रनिकृत्तबाहुर्महासिकृत्ताग्र इवाचलेंद्रः।
उत्पाटयामास करेण वृक्षः ततोमिदुद्राव रणे नरेंद्रम्॥२८॥
तं तस्य बाहुं सहशालवृक्षं समुद्यतं पन्नगभोगकल्पम्।
इंद्रास्त्रयुक्तेन जहार रामो बाणेन जांबूनदभूषितेन॥२९॥

श्रीराम कुंभकर्णाचा डावा हात तोडून टाकतात : निकट येतां कुंभकर्ण। वायव्यास्त्र सज्जून। श्रीरामें सोडिला बाण। निजनिर्वाणसाटोपें॥८१॥ धन्य त्या बाणाची नव्हाळी[1]। मुद्गर असतांही करतळीं। बाहु छेदोन समूळीं। भूमंडळी पाडिला॥८२॥ बाहुं छेदितां समूळीं। कुंभकर्ण आतुर्बळी। तेणें घायें न डंडळीं[2]। आला आरोळी देऊनी॥८३॥

उजव्या हाताने शालवृक्ष घेऊन कुंभकर्ण रामांवर धावला : छेदिलिया वामहस्त। माझा न वचे पुरुषार्थ। दक्षिण हस्तें मी समर्थ। रणीं रघुनाथ मारावया॥८४॥ श्रीराम लक्षून केवळ। दीर्घ उपडोनियां शाल। धांविन्नला उतावेळ। रणकल्लोळ संग्रामी॥८५॥ रणीं सरकत थरकत। शालहस्तें तळपत। मारावया श्रीरघुनाथ। असे धांवत साटोपें॥८६॥ श्रीरामाचे येतां बाण। शालहस्तें मोडून। रणीं मारावया रघुनंदन। आला गर्जोन कुंभकर्ण॥८७॥ आजानुबाहु अत्यंत थोर। शोभा शोभे भुजंगाकार। मारावया श्रीरामचंद्र। शाल वृक्ष उचलिला॥८८॥

श्रीरामांनी कुंभकर्णाचा उजवा हात इंद्रास्त्राने तोडला : त्याचा जंव लागे घावो। तंव श्रीरामें करोनि लवलाहो[3]। इंद्रास्त्र सज्जूनि पहा हो। सशाल बाहु छेदिला॥८९॥ सुवर्णपत्री बाण शोभत। छेदोनि कुंभकर्णाचा हात। बाण परतोनि भातां रिघत। श्रीरघुनाथ प्रतापी॥९०॥ उभयं भुजा रघुपती। छेदोनि पाडिलिया क्षितीं। धनुष्य ठेवोनियां हातीं। श्रीरघुपति राहिला॥९१॥ उभय भुजा जाल्या क्षीण। रणीं निःशस्त्री कुंभकर्ण। त्या वीर न विंधी बाण। धर्मप्रवीण श्रीराम॥९२॥

हस्तविहीन कुंभकर्णाने उड्डाण केलें : कुंभकर्ण म्हणे श्रीरामासीं। तूं कां रे युद्ध न करिसी। प्रळयशक्ति आहे मजपासीं। तुम्हा दोघांसी मारावया॥९३॥ मज न[4] मानीं[4] निःशस्त्री[5] क्षीण। करोनियां रणउड्डाण। दोघां करीन शतचूर्ण। वानरसैन्यसमवेत॥९४॥ ऐसें बोलोनि कुंभकर्ण। दुर्धर धांव घेतली जाण। मारावया रामलक्ष्मण। आला आपण साटोपें॥९५॥ अमित[6] विंधितां पैं बाण। मागें न सरे कुंभकर्ण। दोघां करावया शतचूर्ण। दीर्घ उड्डाण तेणें केले॥९६॥

त कृत्तबाहुं समवेक्ष्य रामः समापतंतं सहसोन्नदन्तम्।
ततोऽर्धचंद्रौ निशितो गृहीत्वा चिच्छेद पादौ युधि राक्षसस्य॥३०॥
स कृत्तबाहुर्विनिकृत्तपादो विदार्य वक्त्रं वडवामुखाभम्।
दुद्राव रामं सहसाभिगर्जन्राहुर्यथा चंद्रमिवांतरिक्षे॥३१॥

श्रीरामांनी कुंभकर्णाचे दोन्ही पाय तोडलें : बाहु छेदिल्या निशाचर। मारावया रामचंद्र धांविन्नला अति सत्वर। कोपें दुर्धर उडाला॥९७॥ सवेग उ[illegible]लोनि उड्डाण। चूर्ण करावे रामलक्ष्मण। येणें लाघवें कुंभकर्ण। आला धांवोनि आवेशें॥९८॥ म्हणे रामा राहें साहें। माझा यावा[7] आला पाहें। तुज कोण राखेल माये। गर्जोनि लवलाहें उडाला॥९९॥ येतां देखोनि निशाचर। बाण काढिला अर्धचंद्र। ज्याची लागतांचि धार। छेदी जिव्हार

शब्दार्थ : १. चमत्कार, २. भ्याला नाही, ३. त्वरा, घाई. ४. समजू नकोस, ५. शस्त्ररहित ६. असंख्य, ७. हल्ला.

वायूचें ॥१००॥ श्रीराम 'धनुर्वाडा'[1] संपूर्ण। विंधोनि अर्धचंद्र बाण। उडतां विंधोनि दोनी चरण। कुंभकर्ण पाडिला ॥१॥ नाहीं नाक नाहीं कान। छेदोनियां करचरण। रणीं पाडिला कुंभकर्ण। तरी आंगवण सांडीना ॥२॥ पसरोनिया निजमुख। झेंपावे श्रीरामासंमुख। तें देखोनि शक्रादिक[2]। अलोलिक मानिती ॥३॥ नाहीं नासिक नाहीं कर्ण। नाहीं त्यासी करचरण। अभिनव[3] सोंग कुंभकर्ण। वानरगण हांसती ॥४॥ मुख नाडिलें सुग्रीवें। करचरण खंडिले राघवें। कुंभकर्ण हें सोंग नवें। उचित पावे श्रीरामें ॥५॥ श्रीराम उदार चक्रवर्ती। त्याची छेदोनि दरिद्रकुमती। त्यासी देईल ब्रह्मप्राप्ती। वेद गर्जती पवाडे ॥६॥

हस्तपादविहीन कुंभकर्णाचे धूड श्रीरामांना ग्रासावयास धांवले : जेंवी का राहु आकाशीं। ग्रासूं धांवे पूर्ण चंद्रासी। तेंवी कुंभकर्ण श्रीरामासी। ग्रासावयासी धांवत ॥७॥ सुवर्णपत्री श्रीरामबाण। मुखें ग्रासी कुंभकर्ण। जे जे सोडी रघुनंदन। ते ते आपण स्वयें ग्रासी ॥८॥

अथाददे सूर्यमरीचिकल्पं सब्रह्मदंडांतककालतुल्यम् ।
अरिष्टमैंद्रं निशितं सुपुंखं रामः शरं मारुततुल्यवेगम् ॥३२॥
तं कार्मुके समाधाय विकेष्य च महाबलः। ससर्ज कुंभकर्णस्य वधाय शरमुत्तमम् ॥३३॥
दिव्यं मघवता दत्तं ज्वलंतमिव तेजसा। स विसृष्टो बलवता रामेण निशितः शरः ॥३४॥
कुंभकर्णस्य हृदयं भित्वा धरणिमाविशत् ॥३५॥

श्रीरामांचा कुंभकर्णाच्या हृदयावर बाणाने हल्ला: निजमुखें कुंभकर्ण। रणांगणी ग्रासी बाण। तेणें क्षोभोनि रघुनंदन। शर दारुण सज्जिले ॥९॥ घ्यावया राक्षसाचा प्राण। जेंवी खडतर सूर्यकिरण। तैसे सज्जिले निर्वाणबाण[4]। ज्यांसी निवारण असेना ॥११०॥ श्रीरामें सज्जूनि कोदंड[5]। काळदंड यमदंड। अनिवार ब्रह्मदंड। तैसाच प्रचंड शरविंधी ॥११॥ अरिघ्नास्त्र आणि रुद्रास्त्र। दोन्हीं अस्त्रें अनिवार। रामें सज्जून समंत्र। रणीं रघुवीर विंधित ॥१२॥ ऐसे विंधितां निर्वाणबाण। हृदयीं भेदे कुंभकर्ण। घायीं पडला मूर्च्छापन्न। धरा[6] भेदून शर गेला ॥१३॥

अथाददे शरं चान्यं दिव्यं दिव्याभिमंत्रितम्। कुंभकर्णवधस्यार्थे राघवो हि महाबलः ॥३६॥
स तं महापर्वतकूटसन्निभं सुवृत्तदंष्ट्रं चलचारुकुंडलम् ।
चकर्त रक्षोधिपतेः शिरस्तदा यथैव वृत्रस्य पुरा पुरंदरः ॥३७॥
तद्रामबाणाभिहतं पपात रक्षःशिरः पर्वतसन्निकाशम्।
बभंज पुर्या गृहगोपुराणि प्राकारमुच्चं तमपातयश्च ॥३८॥

कुंभकर्णाचा शिरच्छेद झाला तरी त्यांचे शिर रामांवर आलें : हृदयीं भेदला बाण। तरी मरेना कुंभकर्ण। श्रीरामासीं करावया रण। उपरमे आपण साटोपें ॥१४॥ ऐसें देखोनि जाण। दिव्यास्त्र परम निर्वाण। श्रीरामें सज्जिला बाण। कुंभकर्ण मारावया ॥१५॥ सुवर्णपत्री सुतीक्ष्ण। श्रीरामे स्वयें अभिमंत्रून। मारावया कुंभकर्ण। निर्वाणबाण सोडिला ॥१६॥ अचुकहस्ती श्रीरामचंद्र। पर्वतप्राय त्यांचें शिर। छेदूनि पाडिलें भूमीवर। तरी निशाचर मरेना ॥१७॥ शिर उडोनि आकाशीं। ग्रासूं धांवे श्रीरामासी। धड गडबडित वेगेंसी। ये रघुरायासी रगडावया ॥१८॥

रामांनी कुंभकर्णाचे धड लंकेमध्ये उडविल्याने लंकेमध्ये आक्रांत : श्रीरामें शरधारी। शिर उडविलें अंबरीं[7]। धड विंधोन बाणेंकरीं[8]। लंकेमाझारीं पाडिलें ॥१९॥ धड पाडितां लंकेआंत। तेथेंही मांडला आकांत। गृहें गोपुर पाडित। रगडूं रघुनाथ धड धांवें ॥१२०॥ धड धांवे रगडावयासी। तें पिटून घाली बाणेंसीं। शिर येता ग्रासावयासी। उडवी आकाशी

शब्दार्थ : १. धनुर्विद्येत प्रवीण, २. इंद्रादिक देव, ३. अगदी नवीन, ४. निकराचे बाण, ५. धनुष्य, ६. पृथ्वी ७. आकाशांत, ८. बाणांनें.

शराग्रें ॥२१॥ धड धांवे धरेंसी। शिर धांवे आकाशीं। श्रीराम पिटी त्या दोहींसी। लघुलाघवेंसीं बाणाग्रें ॥२२॥

**वरदाच्या बळाने कुंभकर्णाला पाठ दाखवेपर्यंत प्राण जात नाही :** कुंभकर्णवरदाची थोरी। दुधड केलिया शरीरीं। पाठिमोरा न होतां वैरी। तो धरेवरी पडेना ॥२३॥ शिववरदाची निजथोरी। रणीं पाठिमोरा जाल्या वैरी। तैंच पडावें धरेवरी। प्रेतापरी अचेतन[1] ॥२४॥

**बिभीषणाची अर्धा क्षण पाठ दाखविण्याची श्रीरामांना विनंती :** बिभीषण म्हणे श्रीरामासी। क्षणार्ध पाठी द्यावी यासी। तरीच मरण कुंभकर्णासी। येरवीं आकल्प मरेना ॥२५॥ ऐकतां बिभीषणवचन। क्षोभा चढला रघुनंदन। आकल्पांत करितां रण। पाठी आपण दावीना ॥२६॥

**सूर्यवंशास लांछनास्पद म्हणून श्रीरामांचा नकार :** तिळभरी मागें सरणें। तरी सूर्यवंशा आलें उणें। पूर्वजांसी लाजिरवाणें। निंद्य जिणें[2] क्षत्रियांचे ॥२७॥ मागें सरणे नाहीं सर्वथा। हें नित्य व्रत श्रीरघुनाथा। बिभीषणासीं परम चिंता। होय सांगता कपीप्रती ॥२८॥ पाठी न देता रघुनंदन। आकल्प करितां रण। तरी मरेना कुंभकर्ण। अटक संपूर्ण ओढविलें ॥२९॥ अंगदसुग्रीवादि जुत्पत्ती। अवघे गजबजिले ठाती। कोणे बुझवावा रघुपती। चिंतावर्ती समस्त ॥१३०॥ कार्य साधावया आकांत। एक बळियाढा[3] हनुमंत। आतर्क्य साधील कार्यार्थ। तोही वृत्तांत अवधारा ॥३१॥

**हनुमंताने शेपटीने श्रीरामांना डिंवचताच श्रीरामांनी पाठ फिरविली व कुभंकर्णाचे धड पडले :** युद्ध किरतां धडशिरेंसी। हनुमान येवोनि पाठींसी। पुच्छें डंवची श्रीरामासी। तो फिरोनि त्यासी पूसत ॥३२॥ राम फिरतां रणांगणीं। धडशिर पडलें धरणीं। जयजयकारें देववाणी। स्वर्गी निशाणीं गाजत ॥३३॥ एक वेळ जयजयकार। अवघे गर्जती वानर। विजयी झाला श्रीरामचंद्र। निशाचर[4] पाडिला ॥३४॥ क्षोभो न देतां रघुनाथ। हनुमंतें साधिला कार्यार्थ। अवघे वानर आल्हादयुक्त। हरिखें गर्जत हरिनामें ॥३५॥ माझें राखोनि सत्यव्रत। कळो न देतां विमुख पुरुषार्थ। हनुमंते साधिला कार्यार्थ। तेणें रघुनाथ तुष्टला ॥३६॥ बळवंत विवेकवंत। भक्तिवैराग्य ज्ञानवंत। सर्वार्थी साधक हनुमंत। श्रीरघुनाथ तुष्टला ॥३७॥ ऐसें अनुवादोनि गुण। संतोषोन रघुनंदन। देवोनि हनुमंता आलिंगन। सुखसंपन्न स्वयें केला ॥३८॥ सुखसंपन्न सुरगण। सुखसंपन्न सिद्ध चारण। सुखसंपन्न वानरगण। रणीं कुंभकर्ण पाडिला ॥३९॥

तं तु भूमौ निपतितं रक्षा विक्षिप्तभूषणम्। राक्षसानां सहस्रे द्वे कायेनातिव्यपोथयत् ॥३९॥
स चातिकायो हिमवत्प्रकाशो रक्षोधिपस्तोयनिधेः समीपे।
ग्राहान्परान्मीनवरान्भुजंगान्विक्षोभ्य भूमिं च तथा पपात ॥ ४० ॥
सवेगं पतता लंका प्राकारास्तोरणानि च। तस्मिन्निपतिते भूमौ चक्षुभे च महोदधिः ॥४१॥

**कुंभकर्णाच्या शरीरावयवपाताने अनेक जीवांना त्रास :** मुकुट कुंडले सालंकार। विक्राळ दंष्ट्रा[4] दशन[5] क्रूर। कुंभकर्णाचें दीर्घ शरीर। रामें सत्वर छेदिलें ॥१४०॥ श्रीरामें शिर छेदोनि बाणीं। सवग पाडितांचि धरणी। दोन सहस्र राक्षसश्रेणी। दडपोनि रणीं निमाले ॥४१॥ दडपोनि मारावया श्रीरामासी। धड गडबडितां आवेशीं। असंख्य दडपिलें राक्षसांसी। अति आवेशीं रणमर्दे ॥४२॥ शरीर रणवेगें गडबडित। जावोनि पडिलें समुद्रांत। तेथें जळचरांचा विघात। केला वृत्तांत तो ऐका ॥४३॥ तिमि[6] तिमिंगिळ[7] मत्स्य मगर। कच्छप नक्र[8] जळचर। या अवघियांचा करितां चूर। गेले सत्वर पाताळा ॥४४॥ कुंभकर्ण पडतां तळीं। भूकंप

---

शब्दार्थ : १. निर्जीव, २. जीवित, ३. बलाढ्य, ४. राक्षस (कुंभकर्ण), ५. दाढा, ६. दांत, ७. मत्स्यविशेष, ८. सुसरी.

जाला ते काळीं। गडबडिल्या लंकापौळी[1]। समुद्र ते काळीं उचंबळला॥४५॥ बैसतांचि रसातळीं। महाभुजंगाच्या मेळी। पन्नग दडपले देहातळीं। नेटेंपाटें पाताळी बैसला॥४६॥ जैसा हिमाचल गिरिवर। तैसें शरीर महाथोर। करित जळचरांचा चकचूर। गेले सत्वर रसातळा॥४७॥

राक्षस - सैन्याची लंकेला माघार : रणीं मारितां वानर। उरले जे का निशाचर। दीर्घ करोनि बोंबस्वर। रणीं सत्वर पळाले॥४८॥ युद्धाभिघातें अति आंत। रणमारें जर्जरीभूत। कण्हत कुंथत कापत। लंकेआंत पळाले॥४९॥ जेंवी इंद्रे मारिला वृत्रासुर। तेंवी रामें मारिला महावीर। सुमनें[2] वर्षती सुरवर। जयजयकारें गर्जोनी॥१५०॥ एका जनार्दना शरण। रणीं मारोनि कुंभकर्ण। विजयी जाला रघुनंदन। सुखसंपन्न कपिकुळें॥५१॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे कुंभकर्णवधो नाम अष्टाविंशतिमोऽध्यायः॥२८॥ ओंव्या॥१५१॥ श्लोक॥४१॥ एवं॥१९२॥

# अध्याय एकोणतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

## नरांतकाचा वध

कुंभकर्णाच्या वधाने रावणाचा शोक : श्रीरामें मारिला कुंभकर्ण। ऐकोनियां पैं रावण। स्वयें करी शंखस्फुरण। दुःखें प्राण निघो पाहे॥१॥

कुंभकर्णं हतं श्रुत्वा राघवेण महात्मना। राक्षसा राक्षसेंद्राय रावणाय न्यवेदयन्॥१॥
स श्रुत्वा निहतं संख्ये कुंभकर्णं महाबलम्। रावणः शोकसंतप्तो मुमोह च पपात च॥२॥
राज्येन नास्ति मे कृत्यं किं करिष्यामि सीतया। कुंभकर्णविहीनस्य जीविते नास्ति मे स्पृहा॥३॥
तदिदं मामनुप्राप्तं विभीषणवचः शुभम्। यदज्ञानान्मया तस्य न गृहीतं महात्मनः॥४॥

येवोनि घायाळ रक्षोगण। सांगती कुंभकर्णाचें मरण। सुग्रीवें छेदिले नाककान। रामें करचरण छेदिले॥२॥ ऐसा विटंबोनियां जाण। रणीं मारिला कुंभकर्ण। अदट श्रीराम आंगवण। न लागतां क्षण निर्दळिला॥३॥ कुंभकर्णाची जे वरदावस्था। श्रीरामें तेही केली वृथा। रणीं छेदून पाडिला माथा। क्षणार्धता बाणें अर्धचंद्रे॥४॥ विटोंबोनि मारिला कुंभकर्ण। ऐसें ऐकोनि रावण। बंधुस्नेहें तळमळोन। पडे आपण मूर्च्छित॥५॥ सवेंचि होवोनि सावधान। दीर्घस्वरें करी रुदन। कुंभकर्ण निमाल्या जाण। मज कोण चाड[3] राज्याची॥६॥ मज चाड नाहीं राज्यासीं। मज चाड नाहीं सीतेंसी। चाड नाहीं जीवितासीं। अति आक्रोशीं स्फुंदत॥७॥ देवदैत्यदानवांसी रण। करितां नाटोपें कुंभकर्ण। त्यासी मानवी श्रीरामबाण। लागतां प्राण सांडिला॥८॥ बिभीषण बोलिला वचन। तें तें वाक्य अति प्रमाण। म्यां तैं केला गर्वाभिमान। तें हों निदानीं[4] पावलों॥९॥ रणीं निघोनि कुंभकर्ण। शत्रु निर्दळील संपूर्ण। तोचि रणीं पडला आपण। आतां मी प्राण राखेंना॥१०॥ बंधुस्नेहें रावण। अति दुःखें दुःखीं निमग्न। अतिशयें आक्रंदोन। मूर्च्छापन्न तो पडिला॥११॥ पिता पडतांचि मूर्च्छित। अतिकायादि पुत्र समस्त। महोदर महापार्श्वयुक्त। आक्रंदत स्वयें आले॥१२॥

पितृव्यं निहतं दृष्ट्वा देवांतकनरांतकौ। त्रिशिराश्चातिकायश्च रुरुदुः शोकपीडिताः॥५॥
भ्रातरं निहतं श्रुत्वा रामेणाक्लिष्टकर्मणा। महोदरमहपार्श्वौ शोकाक्रांतौ बभूवतुः॥६॥

---

शब्दार्थ : १. लंकेचे आवार, २. पुष्पे, ३. गरज, ४. शेवटी.

रावणाचे त्रिशिराकडून सांत्वन : रावण लोळतां भूमीसीं। पुत्र आले तयापासीं। रडत स्फुंदत आक्रोशी। पितृदुःखेसीं अति दुःखी ॥१३॥ देवांतक नरांतक। त्रिशिरा अतिशय देख। चौघे पुत्र अति नेटक। आले दशमुख ठाकोनी ॥१४॥ दीर्घ स्वरें रडे रावण। ऐकोनियां तयाचे रुदन। महोदर आला आपण। सवेंचि जाण महापार्श्व ॥१५॥ रणीं पडतां कुंभकर्ण। महोदर महापार्श्व जाण। तेही बंधु दोघे जण। आले धांवोन अतिदुःखी ॥१६॥ ऐकोनि रावणविलपन। त्रिशिरा पुत्र आला आपण। सिंहासनी राजरुदन। धुरेचें[1] लक्षण हें नव्हे ॥१७॥

रावणं शोकसंतप्तं त्रिशिरा वाक्यमब्रवीत्। न तु सत्पुरुषा एवं विलपंति यथा भवान् ॥७॥
ननु त्रिभुवनस्यापि पर्याप्तस्त्वं विनिग्रहे। स कथं प्राकृत इव शोचस्यात्मानमीदृशम् ॥८॥
स सर्वायुधसंपन्नो राघवं हन्तुमर्हसि। कामं तिष्ठ महाराज निर्गमिष्याम्यहं रणे ॥९॥
उद्धरिष्यामि ते शत्रुं गरुडः पन्नगं यथा। तथाऽद्य शयिता रामो मया युद्धे निपातितः ॥१०॥

त्रिशिराचा रावणाला उपदेश : शोक संतप्त रावण। हें देखोनियां संपूर्ण। त्रिशिरा बोले आपण। राजलक्षण धुरेचें ॥१८॥ त्रैलोक्यराजा तूं रावण। बंदी घातले सुरगण। तो तूं करिसी रांडरुदन। राजलक्षण हें नव्हे ॥१९॥ दुधड तुटल्या महावीर। ग्लानि न करिती अणुमात्र। रडतां देखोनि दशशिर। लोक समग्र निंदिती ॥२०॥ रडतां नुरे शौर्यशक्ति। रडतां नुरे धैर्यवृत्ति। रडतं नुरे यशकीर्ति। अपयशप्राप्ति रडतांचि ॥२१॥ रुदनें नेली आंगवण। रुदने नेलें राजमहिमान। रुदनें वाढिवे नागवण। तें तू रावण स्वयें करिसी ॥२२॥ रणीं निमाल्या कुंभकर्ण। काय गेली आमची आंगवण[2]। मी एकला करोनि रण। रणीं रघुनंदन मारीन ॥२३॥ मारीन राम लक्ष्मण। विध्वंसीन वानरगण। धरिले रावणाचे चरण। आज्ञापन मज देईं ॥२४॥

श्रुत्वा त्रिशिरसो वाक्यं रावणो राक्षसधिपः। पुनर्जातमिवात्मानं मेने तस्य सुभाषितम् ॥११॥
ततः श्रुत्वा तु तद्वाक्यं देवांतकनरांतकौ। अतिकायश्च तेजस्वी बभूवुर्युद्धकांक्षिणः ॥१२॥
ततो हर्षसमाविष्टा जगर्जुर्नैर्ऋतर्षभाः। रावणस्य सुता वीराः शक्रतुल्यपराक्रमाः ॥१३॥
ततस्तांस्तु परिष्वज्य पूजायित्वा विभूषणैः। आशीर्भिस्तु प्रशस्ताभिः प्रेषयामास संयुगे ॥१४॥
महोदरमहापार्श्वौ भ्रातरौ चापि रावणः। रक्षणार्थं कुमाराणां प्रेषयामास संयुगे ॥१५॥

रावणांचे चारही पुत्र युद्धासाठी सरसावले : एकला मी करोनि रण। रणीं मारीन राम लक्ष्मण। ऐकोनि त्रिशिराचे वचन। दशानन हरिखला ॥२५॥ जेंवी अचेतन पडे प्रेत। त्यासी मागुती ये जीवित। त्रिशिरावचनें लंकानाथ। पावला मानीत पुनर्जन्म ॥२६॥ त्रिशिराचे वचनें देख। संतोषला दशमुख। तेणें देवांतक नरांतक। युद्धासी हरिखे अतिकाय ॥२७॥ रावणाचे चौघे सुत। शक्रसमान बळवंत। युद्धार्थी अति उद्यत। तेणें लंकानाथ हरिखला ॥२८॥ मुकुट कुंडलें वीर कंकणें। चौघां देवोनि भूषणें। चौघे आलिंगोनि रावणें। पुत्र धाडिले संग्रामा ॥२९॥ राखावया चौघां पुत्रांसी। महोदरमहापार्श्वांसी। रावणें धाडिलें त्यांपासीं। संग्रामासीं साह्यार्थ ॥३०॥ पदाति[3] रथ वाजी[4] कुंजर[5]। अदट[6] दाटुगा[7] सैन्यसंभार। युद्धा निघतां राजकुमर। केला दुर्धर गडगर्ज ॥३१॥

रावणाच्या पुत्रांचे रक्षणार्थ महोदर व महापार्श्व हे वीर निघाले : शस्त्रास्त्रीं सन्नद्ध बद्ध। चौघां पुत्रां युद्धदुर्मद[8]। महोदर महापार्श्व बंधु। वीर प्रसिद्ध निघाले ॥३२॥ ऐसे वीर सहाही जण। संग्रामी अति प्रवीण। मारावया राम लक्ष्मण। धाडीं रावण संग्रामी ॥३३॥ युद्धा निघतां सहाही जण। रथाश्व गजवाहन। कोणा कोणासीं कोण कोण। सावधान अवधारा ॥३४॥

---

शब्दार्थ : १. मुख्याचे, नायकाचे, २. सामर्थ्य, शौर्य, ३. पायदळ, ४. घोडे, ५. हत्ती, ६. अजिंक्य, ७. बलाढ्य, ८. युद्धाचा अभिमान.

ऐरावतकूळींचा गज गंभीर। त्यावरी बैसोनि महोदर। युद्धा निघाला सत्वर। जेंवी भास्कर[1] मेघावरी ॥३५॥ त्रिशिरा तिन्हीं मुकुट शिरीं। बैसोनियां रथावरी। इंद्रचापासमान चाप करीं। निघे बाहेरी संग्रामा ॥३६॥ अतिकाय महारथी वीर। रथ मरकताचा[2] आखचक्र। त्यावरी रत्नाढ्य कूबर[3]। वारु विचित्र जुंपिले ॥३७॥ ते रथीं बैसोनि पाहें। संग्रामा आला अतिकाय उत्साहें। त्याचा यावा[4] कोण साहे। दुर्धर होय सुरासुरां ॥३८॥ उच्चैःश्रव्यासम सुंदरू। बळें बळवंत श्वेत वारू। त्यावरी नरांतक वीरू। युद्धी दुर्धरू शोभत ॥३९॥ विद्युत्प्राय खड्ग हातीं। दुर्धर त्याची संग्रामशक्ती। त्यासीं विचरतां युद्धक्षितीं[5]। स्वर्गी कांपती सुरसिद्ध ॥४०॥ जो कां अंतका अंतक। महावीर देवांतक। रथीं बैसोनि एकाएक। आला निःशंक संग्रामा ॥४१॥ मथावया क्षीरसागरीं। जैसा विष्णुहातीं मंदरगिरी। तैसा परिघ घेवोनि करीं। आला बाहेरी देवांतक ॥४२॥ महापार्श्व रथावरी। दुर्धर गदा घेवोनि करीं। करावया महामारी। आला झडकरी संग्रामा ॥४३॥ चौघे रथी एककुंजरी। एक तो शोभे अश्वावरी। करावया वीरमहामारी । आले झडकरी संग्रामा ॥४४॥

प्रगृहीता बभौ तेषां छत्राणामावलिः शुभा। शरदभ्रपतीकाश हंसानामावलिर्यथा ॥१६॥
मरणं चापि निश्चित्य शत्रूणां च पराजयम्। इति कृत्वा मतिं वीरा निर्जग्मुः संयुगार्थिनः ॥१७॥
जगर्जुश्चापि ते नेदुश्चिक्षिपुश्चापि सायकान्। क्ष्वेडितास्फोटितानां वै संचचालेव मेदिनी ॥१८॥
ततो निष्कम्य मुदिता राक्षसेंद्रा महाबलाः। ददृशुर्वानरानीकं समुद्यतशिलानगम् ॥१९॥

जेंवी कां हंसावळी[6] अंबरी। तेंवी श्वेतछत्रांचिया हारी। शोभती राजपुत्रांवरी। युग्मचामरीं संवीज्य[7] ॥४५॥ आजि मरणें कां मारणें। ऐसा श्रीरामीं संग्राम करणें। दृढ निश्चय करितां मनें। युद्धकारणें ते आले ॥४६॥ अश्व रथ महाकुंजर। अदट पायांचे मोगर। चतुरंग सैन्यसंभार। आले सत्वर संग्रामा ॥४७॥ ध्वजा पताका अति विचित्र। किंकिणीज्वाळमाळा मनोहर। युद्धा निघतां राजकुमार । रथकुंजर शृंगारिले ॥४८॥ छत्रें शोभती शिरीं। मुक्तफळांच्या झालरी। निशाणें त्राहाटिल्या भेरी। रणमोहरी गर्जत ॥४९॥ अवघे मिळोनियां वीर। सिंहनाद केला थोर। नादें उतटत[8] अंबर। धरा भूधर[9] सकंप॥ ५०॥ देखोनि छत्रपतिभार। रणीं नाचती वानर। कौतुक पाहे श्रीरामचंद्र। निशाचर मारितां ॥५१॥ शिळा शिखरें गिरीवर हरिखें झेलिती वानर। एक परजिती तरुवर। राजकुमर मारावया ॥५२॥ देखोनि वानरांचें बळ। खवळले राक्षसदळ। घाय हाणिती प्रबळ। युद्ध तुंबळ मांडले ॥५३॥ गदा मुद्गर पट्टिश। शक्ती शूळ परिघ फरश। घाय हाणित राक्षस। आला आवेश वानरां ॥५४॥ करावया रणकंदन। सरसावले अवघे जण। वानरीं केलें विंदान[10] । सावधान अवधारा ॥५५॥

समुद्यतमहाशैलाः मुदा नेदुः पुनः पुनः। अमृष्यमाणा रक्षांसि प्रतिनर्दत वानराः ॥२०॥
केचिदाकशमाविश्य केचिदुर्व्यां प्लवंगमाः। ते पादपशिलाशैलेश्चक्रुर्वृष्टिमुत्तमाम् ॥२१॥
बाणौधैर्वार्यमाणाश्च हरयो भीमविक्रमाः। केचिद्रथगतान्वीरान्गजवाजिगतानपि ॥२२॥
निर्जघ्नुः सहसोत्प्लुत्य यातुधानान्प्लवंगमाः।
शैलशृंगान्वितांगास्ने मुष्टिनिष्कान्तलोचनाः ॥२३॥
चेलुः पेतुश्च नेदुश्च तत्र राक्षसपुंगवाः ॥२४॥

वानर-राक्षस सैन्याचे घनघोर युद्ध : वानर उदित[11] युद्धासीं। सपर्वत उडोनि आकाशीं। पुनः पुनः रामनामेंसीं। अति आवेशीं गर्जत ॥५६॥ वानरवीर नमःस्थळी। राक्षसभार ते भूतळीं। वर्षती पर्वतशिळीं। होत रांगोळी वीरांची ॥५७॥ बाणीं निवारितां पर्वत। वानरवीर

शब्दार्थ : १. सूर्य, २. पाचूचा, ३. इसाड, ४. हल्ला, ५. रणांगणी, ६. हंसपक्ती, ७. वारा घातले गेलेले, ८. फाटू लागले, ९. पर्वत, १०. नवल, चमत्कार, ११. तयार.

अत्यद्भुत। भूतळा येवोनि समस्त। करिती घात राक्षसां ॥५८॥ राक्षसांचे शस्त्रसंपात[१]। वानर तळपोनि करिती व्यर्थ। शिळाद्रुमपर्वतहस्त। रणीं विचरत रणमारें ॥५९॥ एक वानर आकाशीं। वर्षती शिळापर्वतेंसीं। सर्वांग छेदोनि राक्षसांसी। कटिभंगेंसीं खुरडत ॥६०॥ यावरी वानर आकाशीं। कंदन करिती राक्षसांसी। एक ते राहून पृथ्वीसीं। निशाचरांसीं निर्दळिती ॥६१॥ वानरीं साधोनियां रण । मुष्टिघातें पाडिती नयन। एकां राक्षसां दंत भग्न। एकां वमन रुधिरांचें ॥६२॥ एक राक्षस पडिले रणीं। एक आरडती आक्रंदोनी। एक मागती पाणी पाणी। रणांगणीं पळताती ॥६३॥ एक मर्दिती रथस्थ। एक मर्दिती गजस्थ। एक मर्दिती अश्वगत। रणकंदनार्थ राक्षसां ॥६४॥

वानरं वानरेणैव जघ्नुर्घोरा हि राक्षसाः। राक्षसं राक्षसेनैव पिपिषुर्वानरा भुवि ॥२५॥
आक्षिप्य बलिनो जग्मू राक्षसा वानरास्तथा। मुहूर्तेनावृता भूमिरभवच्छोणितप्लुता ॥२६॥
भग्नचर्मतनुत्राणा राक्षसा वानरैर्हताः। सुस्राव रुधिरं तेभ्यः सरितः पर्वतादिव ॥२७॥
रथेन रथिनं चापि राक्षसं राक्षसेन च । हयेन च हयान्केचिन्निष्पिपेषुर्वलीमुखाः ॥२८॥

**राक्षस-सैन्याचे भयंकर निर्दालन :** शस्त्र समग्री जाली चूर्ण। पायीं पिष्ट पर्वतपाषाण। विचंबले[२] हतियेराविण। ते काळींचे रण अवधारा ॥६५॥ वानरीं उचलोनि वानरांसीं। रणीं मारिती राक्षरांसी। राक्षसी उचलोनि राक्षरांसी। रणीं वानरासी निर्दळिती ॥६६॥ रणीं रणमर्दे उन्मत्त वीर। तयां नाठवे आपपर। रण मांडले घोरांदर[३]। येरां येर निर्दळिती ॥६७॥ पाचारोनि रणांगणी। निधडे वीर झोंटधरणी[४]। भिडताती रणांगणी। आयणीपायणी[५] संग्राम ॥६८॥ रणीं मोडलीं वोढणें[६]। घायीं झडलीं अंगत्राणें। राक्षस मारिले जीवें प्राणें। पर्वतपाषाणें वानरीं ॥६९॥ जेंवी पर्वतीं आरक्त पाझर। तैसे वाहती रुधिरपूर। रणीं खवळले वानर। निशाचर मारितां ॥७०॥ रणभूमि अति दुर्गम। मांसशोणितकर्दम । रणी खवळोनि प्लवंगम[७]। राक्षसां परम गांजिलें ॥७१॥ दुर्धर वानरांचा मार। रणीं उठला हाहाकार। मोडला राक्षसांचा भार। घायीं जर्जर विव्हळती ॥७२॥ दुर्धर वानरांचा मार। कोपें खवळला नरांतक वीर। अश्वारूढ अति दुर्धर। वानरां मार करूं आला ॥७३॥ शिळा शिखरें वृक्ष पर्वत। वानरीं सांडिले अत्यद्भुत। खड्ग निवटोनि समस्त। वानरां घात करूं आला ॥७४॥

ततो हयं मारुततुल्यवेगामरुह्य शक्तिं निशितां प्रगृह्य
नरांतको वानरराजसैन्यं विवेश मीनश्च यथार्णवौघम्
सवानरान्सप्तशतानि वीरः प्रासेन दीप्तेन विनिर्बिभेद
एकः क्षणेनेंद्ररिपुर्दुरात्मा जघान सैन्यं हरिपुंगवानाम्
न शेकुर्वानराः सोढुं ते विनेदुर्महास्वरान् । ते त्रस्ता वानरश्रेष्ठाः सुग्रीवमुपतस्थिरे ॥३१॥

**नरांतक - अंगद यांचे युद्ध :** ठाणमाण शुभ्र सुंदरू। वायुवेगाहून सवेग वारु[८]। तो अश्वारूढ नरांतक वीरू। वानरां मारू करूं आला ॥७५॥ तुरंगासनी खड्गहस्त[९]। सात दशक दहाशत। वानर मारी शतानुशत। होत आकांत कपिकुळा ॥७६॥ शिळा शिखरें वृक्ष पर्वत। वानरां साटोपें हाणित। खड्गहस्तें तोडूनि समस्त। करी प्रळयांत वानरां ॥७७॥ करावया रणमारा। वानरीं उपडितां गिरिवरा। उडतां वाजे खड्गधारा। वमित रुधिरा पाडिले ॥७८॥ वानर उसळले गगनासीं। वारू उडवोनि आकाशीं। निरालंबी निवटीं त्यांसी। कपिप्रळयासी नरांतक ॥७९॥ पूर्वी नांव नरांतक। आतां जाला वानरांतक। अवघीं घेवोनि युद्धधाक।

---

शब्दार्थ : १. शस्त्रांचे नेम, धाव, २. कष्ट पावले, ३. भयंकर, ४. एकमेकांच्या शेंड्या धरून, ५. क्रमाक्रमाने, ६. ढाली ७. वानर, ८. घोडा, ९. तरवार हातात घेऊन.

एक एक पळाले ॥८०॥ जेंवी का मातला मगर। तेणें खळबळीत सागर। तेंवी वारनसैन्य समग्र । त्रासिलें थोर नरांतकें ॥८१॥ नरांतकाच्या समोर। राहूं न शकती वानर। किंकाळ्या देवोनि समग्र। सुग्रीव थूर ठाकिले ॥८२॥ सुग्रीव आमुचा कपिनाथ। संग्रामी राखील स्वस्थ । येणें विचारें समस्त। आले धांवत तयापासीं ॥८३॥ वानर पडिले निचेष्टित। सुषेण वैद्य अति समर्थ। देवोनि श्रीरामचरण तीर्थ। उठविले समस्त संग्रामीं ॥८४॥ लावितां श्रीरामपादकण। कानपले[1] घायांचे वण। करितां श्रीरामनामस्मरण। वानरगण ऊठले ॥८५॥ घेता श्रीरामचरणोदक। स्वस्थ झाले सकळिक। पुढें मारावयां नरांतक। सुग्रीव सम्यक[2] क्षोभला ॥८६॥

दृष्ट्वोवाच महातेजा: सुग्रीवो परिपुंगव:। कुमारमंगदं वीरं शक्रतुल्यपराक्रमम् ॥३२॥
गच्छैनं राक्षसं वीरं योसौ तुरगमास्थित:। भक्षयंतं च सैन्यानि क्षिप्रं प्राणैर्वियोजय ॥३३॥
सभर्तुर्वचनं श्रुत्वा निष्पपातांगदस्तदा। निरायुधो महातेजा: केवलं नखदंष्ट्रवान् ॥३४॥
नरांतकमुपागम्य वालिसूनुरुवाच ह। तिष्ठ किं प्राकृतैरेभिर्हरिभिस्त्वं करिष्यसि ॥३५॥
अस्मिन्वज्रसमस्पर्शं प्रासं क्षिप ममोरसि ॥३६॥

अंगदाचे नरांतकाला आव्हान : नरांतकें त्रासिले वानर। तें देखोनि सुग्रीव वीर। त्यासीं करावया रणमार। अंगदकुमर स्वयें धाडी ॥८७॥ अश्वारूढ घोर विक्रांत। करी वानरां प्राणांत। तयाचा करीं जीवघात। सुग्रीव सांगत अंगदासी ॥८८॥ शक्रबळेंसी समान। अंगदाची आंगवण। ऐकोनि सुग्रीवाचें वचन। आलें स्फुरण अंगदा ॥८९॥ श्रीरामासी लोटांगण। वंदुनि हनुमंताचें चरण। सुग्रीवा अभिवंदून। केले उड्डाण अंगदें ॥९०॥ करावया नरांतकासीं झगडा। अंगद वीर असे गाढा। येवोनी उभा ठेला पुढां। जैसा कां कडा मेरूचा ॥९१॥ येऊनी नरांतकासमोर। उदार धीर अति गंभीर। अंगद बोलिला उत्तर। नि:शंक शूर प्रतापी ॥९२॥ पालेखाईर वनचर। किंकरें कां मारिसी वानर। मी आलो असें तुजसमोर। हाण हतियेर मजलागीं ॥९३॥शस्त्रास्त्रांची सामग्री। जे जे असेल तुजपासीं खरी। ते ते घाली मजवरीं। अंगद गजरीं गर्जत ॥९४॥अंगदाच्या कठिण उत्तरीं। नरांतक क्षोभेंकरीं[3]। निजखड्गाच्या खड्गधारीं। हृदयावरी हाणितला ॥९५॥

अंगदस्य वच: श्रुत्वा स च क्रुद्धो नरांतक:। संपीड्य दशनैरोष्ठौ नि:श्वस्य च पुन: पुन: ॥३७॥
तं प्रासमादाय समुज्वलंदंतं ससर्ज वेगेन च वानराय स वालिपुत्रोरसि वज्रकल्पे बभूव भग्न: पतितश्च भूमौ ॥३८॥

दांत खावोनि करकरां। खड्ग भोवंडोनि गरगरां । हृदयावरी वानरा। खड्गधारा हाणितलें ॥९६॥ अंगदाचे बळ वितंड। घाव हाणितां प्रचंड। खड्ग जालें दुखंड। गेलें बळबंड[4] राक्षसी ॥९७॥ अखंड रामनामस्मरण। अंगदहृदय अच्छेद्य जाण। खड्गभंगासी कारण। रामस्मरण सप्रेम ॥९८॥ आवडीं समस्तां श्रीरघुनाथ। द्वंद्वबाधा[5] नित्य निर्मुक्त। काय खड्गाचा आघात। निमेषार्धात भंगेल ॥९९॥ खड्ग आदळतां हृदयआरामीं। दुखंड होवोनि पडिले भूमीं। अंगद गर्जोनि संग्रामी। युद्धानुक्रमीं खवळला ॥१००॥

असिं समालोक्य तदा च भग्नं सुपर्णकृत्तोरगभोगकल्पम्।
मुष्टिं समुद्यम्य स वालिपुत्रस्तुरंगमं तस्य जघान मूर्धनि ॥३९॥
स तस्य वाजिर्निपपात भूमौ तलप्रहारेण विशीर्णशीर्ष:।
नरांतक: क्रोधवशं जगाम। हतं तुरंगं पतितं समीक्ष्य ॥४०॥
स मुष्टिमुद्यम्य स महानुभावो जघान शीर्षे युधि वालिपुत्रम्।
अथांगदो मुष्टिनिपातधीर: सुस्राव तीव्रं रुधिरं च शीर्षात् ॥४१॥

---

शब्दार्थ : १. बुजून गेले, २. योग्य, ३. रागाने, ४. शक्तीची प्रौढी, ५. सुखदु:खादि पीडा.

मुहुः प्रजज्वाल मुमोह चापि। संज्ञां समासाद्य च विस्मितोऽभूत्॥४२॥

अंगदाचा नरांतकावर जोराचा हल्ला : गरुड छेदी जेंवी उरग। तैसें छेदोनि सांडिलें खड्ग। अंगदासी आला राग। राक्षस सांग वधावया॥१॥ विद्युत्प्राय वारु तळपत। अंगदें ताडितां मुष्टिघात। टाळू फोडोनि सदंत। वारू रणांत पाडिला॥२॥ धन्य त्या मुष्टिघाताची थोरी। नेत्र धरेवरी। वारू न्हाणोनि रुधिरीं। रणामाझारीं पाडिला॥३॥ वारु मारितां निःशेख। दूर उडाला नरांतक। शस्त्रसामग्री नसतां देख। अति तवक युद्धाचा॥४॥ मुष्टि वळोनि क्रोधेंकरीं। अंगद ठोकिला उरावरी। जात जात अति चांचरी। स्वयें सांवरी मूर्च्छेतें॥५॥ ब्रह्मांडी तडकला मुष्टिघात। नाकीं तोंडी रुधिरोक्षित[1]। अंगद पडिला मूर्च्छित। रणाआंत मुष्टिघातें॥६॥ अंगद पडितांचि मूर्च्छित। स्वयें स्मरें श्रीरघुनाथ। श्रम जावोनि समस्त। उठिला गर्जत संग्रामा॥७॥ करितां श्रीरामनामस्मरण। श्रम जावोनि संपूर्ण। आलें शतगुणें स्फुरण। राक्षसकंदन करावया॥८॥ आघाती[2] आठवे श्री रघुनाथ। त्याचें भाग्य अति समर्थ। त्यासीं बाधेना अनर्थ। विजयान्वित तिहीं लोकीं॥९॥ रामनाम स्मरणापुढें। विघ्न कायसें बापुडें। अंगदाचें बळ गाढें। युद्ध कैवाडें[3] मांडिलें॥११०॥

अथांगदो वज्रसमप्रवेगः संबध्य मुष्टिं गिरिश्रृंगकल्पम्।
निपातयामास तदा महात्मा नरांतकस्योरसि वालिपुत्रः॥४३॥
नरांतका भूमितले पपात यथाचलो वज्रनिपातभग्नः।
तदांतरिक्षे त्रिदशोत्तमानां वनौकसां चापि महान्निनादः॥४४॥
बभूव तस्मिन्निहतेऽतिवीर्ये नरांतके वालिसुतेन संख्ये॥४५॥

अंगदाने नरांतकाचा वध केल्याने वानर सैन्याला हर्ष : मूर्च्छा भांजोनि[4] अंगद। स्वयें होवोनि सावध। करावया नरांतकाचा वध। अति उन्नद्ध[5] ऊठिला॥११॥ मुष्टि वळोनि क्रोधेंकरी। वेगें हाणितां उरावरी। हाडे करोनि चकचुरी। धरेवरी पाडिला॥१२॥ नाकीं तोंडी रुधिरधारा। लागल्या नरांतक वीरा। एकें घायें करोनि पुरा। निशाचरा पाडिलें॥१३॥ नरांतक महाबळी। अंगदे पाडिला क्षितितळीं। कपी नाचती सुखसमेळीं। पिटली टाळी सुरसिद्धी॥१४॥ एक रावणराजकुमर। दुजा वाळिसुत राजपुत्र। युद्ध करोनि घोरांदर। कुमरें कुमर मारिला॥१५॥ करोनि रामनामगजर। हरिखें[6] नाचती वानर। स्वर्गी नाचती सुरवर। अंगदवीर निजविजयी॥१६॥ एका शरण जनार्दनीं। नरांतक पडिला रणीं। उरल्या वीरीं पांच जणीं। केली करणी ते ऐका॥१७॥ अंगदें नमिला रघुनंदन। रामें दिधलें आलिंगन। वंदून लक्ष्मणाचे चरण। अभिनंदन हनुमंता॥१८॥ सुग्रीवराजेंद्रा दंडवत। वानरवीर जे समस्त। अंगद पायावरी लोळत। अवघे गर्जत स्तुतिवादें॥१९॥ वीरशूर प्रतापवंत। राजपुत्र आणि विनीत। अवघे हरिनामें गर्जत। स्तुति वदत अंगदाची॥१२०॥ रम्य रामायणकथार्थ। नरांतका जाला अंत। एका जनार्दना शरणागत। रणीं परमार्थ श्रीरामें॥२१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकार टीकायां नरांतकवधो नाम एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः॥२९॥ ओंव्या॥१२१॥ श्लोक॥ ४५॥ एवं॥१६६॥

## अध्याय तिसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### देवांतक व त्रिशिर यांचा वध

नरांतकाच्या वधामुळे त्याचे पाचहीपुत्रांचे रणांगणावर आगमनः अंगदें मारिला नरांतक।

शब्दार्थ : १. रक्तबंबाळ, २. संकटसमयी, ३. चातुर्याने, ४. सांवरून, ५. तयार होऊन, ६. आनंदाने.

राक्षसदळीं परम धाक। पळोनियां वीरनायक। लंकेसंमुख निघाले॥१॥ पळतां देखोनि राक्षसभार। कोपा चढला राजकुमर। अवघे होऊनि एकत्र। निशाचर परतले॥२॥

नरांतकं हतं दृष्ट्वा चुक्रुशुर्नैर्ऋतर्षभाः। देवांतकस्त्रिमूर्धा च पौलस्त्यश्च महोदरः॥१॥
आरूढो मेरुसंकाशं वानरेंद्रं महोदरः। वालिपुत्रं महावीर्यमभिदुद्राव वीर्यवान्॥२॥
भ्रातृव्यसनसंतप्तस्तदा देवांतको बली। आदाय परिघं घोरमंगदं समभ्यद्रवत्॥३॥
रथमादित्यसंकाशं युक्तं परमवाजिभिः। अस्थाय त्रिशिराश्चापि वालिपुत्रमुपाद्रवत्॥४॥
स त्रिभिर्मेघसंकाशैर्नैर्ऋतैस्तैरभिद्रुतः। वृक्षमुत्पाटयामास महाविटपमंगदः॥५॥

अंगद वीरशिरोमणी। नरांतक पाडिला रणीं। तें देखोनि पांचही जणीं। आलें गर्जोनी संग्रामा॥३॥ त्यांहीमाजी तिघे वीर। त्रिशिरा देवांतक महोदर। रणीं मारावया अंगद वीर। अति सत्वर धांवले॥४॥ रणीं मर्दावया अंगद वीर। गजारूढ महोदर। धांविन्नला अति दुर्धर[1]। घायें वानर मारावया॥५॥ बंधुस्नेहें आत्यंतिक। खवळोनियां देवांतक। परिघ[2] हाणावया संमुख। देवोनि हाक पैं आला॥६॥ अनर्घ्य[3] रथ अनर्घ्य वारू। त्यावरी बैसोनि त्रिशिरा वीरू। रणीं मारावया वानरू। अति सत्वर धांविन्नला॥७॥ रणीं मारावया जुत्पती[4]। एक गजी दोघे रथी। धांवतां संग्राममव्युत्पत्तीं[5]। अंगदें ख्याती लाविली॥८॥ रावणकुमर रणप्रवीण। एकावरी तिघे जण। येतां देखोनियां जाण। आलें स्फुरण अंगदा॥९॥ अतिरथी तिघे जण। करित आले गडगर्जन। करावया तिघांसींही रण। आलें स्फुरण अंगदा॥१०॥ जैसा शनैश्चर जाण। तीन राशी भोगी आपण। तैसाच अंगद रणप्रवीण। तिघे जण मर्दावया॥११॥ मेघगर्जनें गर्जती वीर। रामनामें गर्जे वानर। युद्ध मांडिलें घोरांदर[6]। शस्त्र संभार सूटले॥१२॥

महोदरं समासाद्य शालमुत्पाट्य वीर्यवान्। देवांतकाय तं वीरश्चिक्षेप सहसांगदः॥६॥
महावृक्षे महाशैलं शक्रो दीप्तमिवाशनिम्। त्रिशिरास्तं तु चिच्छेद शैरराशीविषौपमैः॥७॥
वृक्षं निकृत्तमालोक्य समुत्पत्य ततोऽगदः। स ववर्ष ततो वृक्षाञ्शिलाश्च कपिकुंजरः॥८॥
तांश्चिच्छेद सुसंक्रुद्धस्त्रिशिरा निशितैः शरैः। परिघाग्रेण तान्वृक्षाञ्शिलाश्च निजधान सः॥९॥

रावणाचे तिघे पुत्र एकट्या अंगदावर चालून येतात : दोघे रावणराजकुमर। महाबळ महोदर। क्षोभला अंगद वाळिकुमर। तिघे वीर मारावया॥१३॥ पर्वतभारेंसी। संभार। उपडोनि शालवृक्ष थोर। देवांतकावरी वानर। रागें सत्वर सोडित॥१४॥ वाजतां अंगदाची हाक। येतां देखोनि संमुख। अवो[7] भुलला देवांतक। उपाव एक सुचेना॥१५॥ येणें मारिला नरांतक। तैसाच मारील देवांतक। त्रिशिरा धांवोनियां देख। शालवृक्ष छेदिला॥१६॥ वृक्ष छेदितां शतधारीं। अंगदें लोठोनी पुच्छेंकरीं[8]। पाडितां राक्षसांचे भारी। शतसहस्त्रीं प्राणांत॥१७॥ राक्षसदळीं हाहाकार। अंगदें केला महामार। विस्मित त्रिशिरा महोदर। धन्य वानर प्रतापी॥१८॥ तिघांसीं युद्ध करी समोर। पुच्छें मारी राक्षसभार। अंगद प्रतापी वानर। सुरासुर वानिती॥१९॥ माझ्या वृक्षाचा आघात[9]। तिघीं मिळोनि केला व्यर्थ। अंगद क्षोभला अत्यंत। रणकंदनार्थ करावया॥२०॥ मारावया निशाचर। पाचारोनि निजवानर। म्हणे शिळा पर्वत शिखर। रणीं सत्वर पुरवावे॥२१॥

अंगदाचा रावणाच्या तिन्ही पुत्रांवर हल्ला : ऐसें सांगोनि वानरांसी। अंगद उसळला आकाशीं। मग माडिलें संग्रामासी। अति आवेशीं क्षोभोनी॥२२॥ शिळा शिखरें अत्यद्‌भुत। वृक्ष

शब्दार्थ : १. धरावयास कठिण असा, २. आयुधविशेष, ३. अमूल्य ४. मुख्य योद्धे, ५. युद्धकौशल्याने, ६. भयंकर, ७. अहो, ८. शेपटाने, ९. प्रहार.

पाषाण पर्वत। अंगद गर्जगर्जोनि वर्षत। रणीं प्राणांत राक्षसां ॥२३॥ शिळाशिखरीं अत्यद्‌भुतीं रणीं लावोनियां ख्याती। करीन तिघांची समाप्ती। रणव्युत्पती पहा माझी ॥२४॥ उपमर्दून[1] तिन्ही गुण। सुख पावती योगिजन। तुम्हीं मारिल्या तिघे जण। रणकल्याण मज तेव्हां ॥२५॥ ऐसें गर्जोनि समर्थ। शिळाशिखरें द्रुम पर्वत। लागवेगें[2] पैं वर्षत। रणकंदनार्थ राक्षसां ॥२६॥ द्रुमादिपर्वतशिखरें थोर। चेंपला राक्षसांचा भार। रणीं उठला हाहाकार। राजकुमर विस्मित ॥२७॥ आम्हांसी युद्ध करितां संमुख। मागें राक्षस गांजिले निःशेख[3]। अंगद वीर अति अचुक। पाडिलें टक तिघांसीं ॥२८॥ बाणीं पर्वत निवारित। तंव येती असंख्यात। तेही साटोपें जंव तोडित। येती आघात वृक्षांचें ॥२९॥ वृक्ष निवारितां जाण। मस्तकीं वाजती पाषाण। घाबरे केले तिघे जण। रणप्रवीण अंगदें ॥३०॥ बाण तोमर परिघाग्र। तिघीं निवारितां गिरिवर। अंगद वर्षे सत्वर। शिळाशिखरें पर्वती ॥३१॥ जैशा पर्जन्याच्या धारा। तैसा वर्षे गिरितरुवरां। उसंत नाहीं तिघां वीरा। राजकुमारां गांजिलें ॥३२॥ पुरुषार्थाची परम कीर्ती। तिघे वीर ते अतिरथी। अंगदें लावोनियां ख्याती। रणव्युत्पत्ती गांजिले ॥३३॥ त्रिशिरा वीर रणप्रवीण। वज्रास्त्रें विंधोनि बाण। पर्वत तरुवर छेदून। केले शतचूर्ण रणरंगी ॥३४॥ पर्वत पुरविल्या वानरांसीं। त्रिशिरा विंधी अति आवेशीं। तिहीं घेवोनि त्रासासी। सुग्रीवापासीं पळाले ॥३५॥ देवांतकाचा परिघ थोर। महोदराचा तोमर। त्रिशिरा विंधी तीव्र शर। अंगद वीर मूर्च्छित ॥३६॥ अंगद वानरी युवराजा। सांपडला आमच्या समाजा। त्यासी बांधोनिया वोजा[4]। नेऊं विजयध्वजा लंकेसी ॥३७॥ त्यासी बांधवेना संपूर्ण। त्याच्या अंगी आंगवण। मंडप घेवोनि उडाला जाण। त्यासी कोण बांधील ॥३८॥ सांपडला आहे हाताआंत। तंव याचा करूं घात। ऐसें विचारितां समस्त। केलें विपरीत अंगदें ॥३९॥ अंगद पडतां मूर्च्छित आपण। स्मरे श्रीरामनामस्मरण। मूर्च्छा जावोनि संपूर्ण। आलें स्फुरण अंगदा ॥४०॥ महोदरा देवोनि लात। गजीं पाडिला मूर्च्छित। देवांतकासी चपेटघात। तोही रथस्थ पाडिला ॥४१॥ त्रिशिऱ्याचे धनुष्याचें शित[5]। पुच्छें छेदोनियां तेथ। त्याचे बाण करोनियां व्यर्थ। रणीं गर्जत अंगद ॥४२॥ तिघे महावीर दारुण। अंगदासीं करितां रण। धन्य अंगदाची आंगवण। तिघांही जणां नाटोपे ॥४३॥

त्रिशिराश्चांगदं वीरमभिदुद्राव सायकैः। गजेन समभिद्रुत्य वालिपुत्रं महोदरः ॥१०॥
स त्रिभिर्नैर्ऋतश्रेष्ठैर्युगपत्समभिद्रुतः। न विव्यथे महातेजा वालिपुत्रः प्रतापवान् ॥११॥

अंगद नाटोपे रणप्रवीण। त्रिशिरा क्षोभला अति दारुण। काढोनियां निर्वाणबाण। आला गर्जोन संग्रामा ॥४४॥ गजावरून अति तांतडी[6]। महोदरें घातली उडी। तोमरेंसीं लवडसवडी। अंगद कडाडी ठोकिला ॥४५॥ देवांतक तेच अवसरीं। परिघ घेवोनियां करीं। अंगद ताडिला हृदयावरी। गडगर्जे गर्जोनी ॥ ४६॥ परिघ तुळोनि साटोपता। बळें रणरंगी तळपतां। घाव मागुता मागुता। होय हाणिता वारंवार ॥४७॥ तिघे वीर अति विख्यात। सबळ बळें घाव हाणित। अंगद नव्हे व्यथाभूत। घाय मानीत तृणप्राय ॥४८॥ अंगदें उडोनि कडाडीं। गजासी देतां पैं थापडी। डोळे फाडोनियां बुडीं। रणपडिपांडीं[7] मारिलें ॥४९॥

तलेन भृशमुत्पत्य जघान गजमंगदः। पेततुर्नयने तस्य विननाश स वारणः ॥१२॥
विषाणं चास्य निष्कृष्य वालिपुत्रो महाबलः। देवांतकमभिद्रुत्य स जघान तदोरसि ॥१३॥
स विव्हलित सर्वांगो वातोद्‌भूत इव द्रुमः। लाक्षारससवर्णं च सुस्राव रुधिरं मुखात् ॥१४॥
अथाश्वस्य महातेजाः कृच्छ्राद्देवांतको बली। आविध्य परिघं वेगादाजघान तदांगदम् ॥१५॥

देवांतकाचा अंगदाकडून वध : महोदराचा महाहस्ती। थापा हाणोनि पाडिला क्षितीं।

---

शब्दार्थ : १. अपमानून, २. अति त्वरेने, ३. सर्व, ४. आनंदाने, ५. दोरी, ६. त्वरेने, ७. युद्धचातुर्याने.

गजदंत उपडोनियां हातीं। देवांतकाप्रती धांविन्नला ॥५०॥ अंगदें पूर्वरागेंकरीं। देवांतकाचे उरावरी। गजदंत हाणोनि निजगजरीं। धरेवरी पाडिला ॥५१॥ नाकीं तोंडी सुटलें रक्त। लक्षारंगासम[1] आरक्त। मुखीं रुधिरातें वमित। रणीं मूर्च्छित पडियेला ॥५२॥ तोंडी सुटलें रक्त तडफडी। हात पाय स्वयें वोढी। अति कष्टाच्या पडिपाडीं। मूर्च्छा गाढी भांजिली ॥५३॥ मूर्च्छा भांजोनि[२] संपूर्ण। देवांतक स्वयें आपण। परिघ घेवोनि दारुण। अंगद जाण ठोकिला ॥५४॥ परिघ लागतांचि निजनेटीं। रणरंगी मेटीकुटी[३]। घालोनि[३] बैसला जगजेठी। मूर्च्छा पोटीं सांवरूनी ॥५५॥ अंगदें करितां उड्डाण। त्रिशिरा विंधी दारुण बाण। महोदर स्वयें आपण। हाणी निर्वाण तोमरें ॥५६॥ सर्पप्राय त्रिशिराबाण। ललाटीं भेदला दारुण। धन्य अंगदाची आंगवण। अणुप्रमाण न ढळेचि ॥५७॥ दोहीं कटकीं वाजली हाक। अंगद बळिया चोख। तेणें हनुमंता हरिख। आला तवक नीळासीं ॥५८॥

ततोऽगदं परिक्षिप्तं त्रिभिनैर्ऋतपुंगवैः। हनूमानथ विज्ञान नीलश्चापि प्रतस्थतुः ॥१६॥
ततश्चिक्षेप शैलाग्रं नीलस्त्रिशिरसे तदा। तद्रावणसुतः शूरो निर्बिभेद शितैः शरैः ॥१७॥
ततश्चूर्णितमालोक्य हर्षाद्देवांतकस्तदा। परिघेणाभिदुद्राव मारुतात्मजमाहवे ॥१८॥
तमापतंतमुत्पत्य हनूमान्कपिकुंजरः। आजघान तदा मूर्ध्नि वज्रकल्पेन मुष्टिना ॥१९॥
स मुष्टिनिष्पिष्टविभिन्नमूर्धा विशीर्णदंताक्षिप्रलंबजिव्हः।
देवान्तको राक्षसराजसूनुर्गतासुरुर्व्यां सहसा पपात ॥२०॥

अंगदाच्या साहाय्यार्थ हनुमंताचें आगमन व त्रिशिर-हनुमंत युद्ध : तिघां जणांसी भिडतां। अंगद श्रमला युद्ध करितां। हनुमंत त्यासीं साह्य जातां। नीळही तत्वतां स्वयें आला ॥५९॥ त्रिशिरा अंगदां विंधी बाण। त्यासी नीळें पाचारून। दीर्घ पर्वत अति सघन। घाली गर्जोन मस्तकीं ॥६०॥ त्रिशिरा धनुर्वाडा चोख। लक्ष साधून शरसन्निष्ठ[४]। घायें पर्वत केला पिष्ट। पाडिला सकूट[५] पृथ्वीसीं ॥६१॥ पर्वत छेदिला त्रिशिरेंनीं। तेणें देवांतक हरिखेजोनी[६]। निजपरिघेंसी गर्जोनी। हाणी धांवोनी हनुमंता ॥६२॥ हनुमान रणीं धीट नीट। त्याचा परिघ करोनि पीठ। टोला देतां चतुस्फोट। पाडिला स्पष्ट पृथ्वींसीं ॥६३॥ कैसा टोल्याचा आघात। भग्न मस्तक रूधिरांकित। पृथ्वीतळीं सनेत्र दांत। जिव्हा लोळत सलंब ॥६४॥ देवांतक रावणसुत। टोल्यासाठीं[७] करोनि घात। रणीं पाडिला निश्चेष्टित। केला प्राणांत हनुमंतें ॥६५॥

ततस्तु नीलः प्रतिलब्धसंज्ञः सशैलमुत्पाट्य सवृक्षखंडम्।
सुदूरमुत्पत्य खमुग्रवेगो। महोदरं तेन जघान मूर्ध्नि ॥२१॥
स तेन शैलेन समाहतस्तु रक्षोधिपो भूमितले पपात।
महोदरो जीवितमुत्ससर्ज यथा गजः सिंहबलाभिभूतः ॥२२॥

नीळ - महोदर यांचा संग्राम, महोदराचा वधः येरीकडे[८] नीळ महोदर। युद्धा पेटले दुर्धर[९]। नीळ क्षोभोनि सेनाधर। केला संहार तो ऐका ॥६६॥ महोदराचा तोमर। नीळ उड्डोणें हरी सत्वर। रागें उपडिला गिरिवर। त्यावरी थोर द्रुमशिखरें ॥६७॥ नीळें देवोनियां हाक। पर्वत टाकिता संमुख। महोदरासी टकमक। आली भुली देख रणमारें ॥६८॥ देखतां नीळाची आंगवण। महोदर धाके संपूर्ण। धाकेंचि त्याचा गेला प्राण। गिरिनिवारण कोण करी ॥६९॥ नीळें पर्वत घालितां पैं शिरीं। महोदर पडिला धरेवरी। जाहली हाडांची चकचुरी। प्राणांत करी वानर ॥७०॥ देवांतकातें हनुमान मारी। नीळ महोदरातें संहारी। रावणा जाली पोरमारी। आपांपरी[१०] राक्षसां ॥७१॥

---

शब्दार्थ : १. लाखेच्या रंगासारखा, २. उतरली, सांवरली, ३. गुडघे टेकून, ४. अचुक शरसंधानाने, ५. शिखरासहित, ६. हर्ष पावून, ७. टोल्याचे योगाने, ८. दुसरीकडे, ९. भयंकर, १०. दुर्दशा.

पितृव्यं निहतं दृष्ट्वा त्रिशिरा क्रोधमूर्च्छितः। हनुमंतं सुसंक्रुद्धो विव्याध निशितैः शरै ॥२३॥
ततो हनूमानुत्पत्य हयांस्त्रिशिरसस्तदा। ददार करजैस्तीक्ष्णैर्गजेंद्रं मृगराडिव ॥२४॥
अथ शक्तिं समादाय कालरात्रिमिवांतकः। हनूमंतं प्रचिक्षेप त्रिशिरा रावणात्मजः ॥२५॥
दिवि क्षिप्तां महोल्काभां शक्तिं तां तु महाप्रभाम्। बभंज हनुमांस्तस्य हर्षाच्च विननाद ह ॥२६॥

त्रिशिराची हनुमंतावर क्रोधाने चढाई : अंगदे नरांतकसंहार। देवांतका हनुमान वीर। नीळें मारिला महोदर। त्रिशिरा दुर्धर क्षोभला ॥७२॥ त्रिशिरा कोपोन दारुण। हनुमंतासी विंधिले बाण। पुच्छाग्रें करोनि चूर्ण। केलें उड्डाण हनुमंतें ॥७३॥ हनुमान तळपोनि[१] अंबरीं। त्रिशिरारथाचे वारू चारी। विदारिले नखाग्रीं। जेंवी केसरी[२] गजातें ॥७४॥ विदारूनि वारू चारी। रथ करोनि चकाचुरी। हनुमान गर्जे गिरागजरीं। जो महामारी राक्षसां ॥७५॥ बांधावया हनुमान वीर। त्रिशिरा कोपला अत्युग्र। शक्ति काढिली दुर्धर। रणीं वानर मारावया ॥७६॥ उल्का[३] जैसी कडाडित। कीं काळरात्री धडधडित। करावया हनुमंताचा घात। त्रिशिरा सोडित महशक्ती ॥७७॥ शक्ति अतिशयें दुर्धर भारी। तेज न समाय अंबरीं। कडकडोनि प्रळयगजरीं। हनुम्यावरी लोटली ॥७८॥ धन्य बळिया हनुमंत। पुच्छें शक्तीचा केला घात। मोडून सांडिला रणाआंत। कपि गर्जत स्वानंदें ॥७९॥ शरचाप रणीं केलें व्यर्थ। दुर्धर शक्तीचा केला घात। त्रिशिरा स्वयें कोपान्वित। खड्ग काढित साटोपें ॥८०॥

ततः खड्गं समुत्पाद्य त्रिशिरा राक्षसोत्तमः। निचखान तदा शूरो वानरेंद्रस्य वक्षसि ॥२७॥
खड्गप्रहाराभिहतो हनूमान्प्लवगोत्तमः। आजघान त्रिशिरसं तलेनोरसि वीर्यवान् ॥२८॥
स तलाभिहतस्तेन स्रस्तकेशांबरो भुवि। निपपात महातेजा विसंज्ञस्त्रिशिरास्तदा ॥२९॥
यत्नतस्तस्य खड्गं तु समाक्षिप्य महाकपि। ननाद गिरिसंकाशस्त्रासयन्सर्वराक्षसान् ॥३०॥

त्रिशिरा - हनुमंत यांचे तुंबळ युद्ध व त्रिशिराचा वध : रणीं खवळोनि त्रिशिरा भारी। खड्ग काढोनि कोशाबाहेरी[४]। हनुमान हाणिला उरावरी। खड्गधारीं साटोपें ॥८१॥ रणप्रवीण हनुमंतें। त्रिशिरा हाणोनि तळघातें। हिरोन घेऊन खड्गातें। पाडिला तेथें मूर्च्छित ॥८२॥ खड्गहस्ती हनुमान वीर। रणीं गर्जती वानर। चळीं कांपती निशाचर। अति दुर्धर हनुमंत ॥८३॥ चेतना लाहोनि[५] त्रिशिरा। देखोनि खड्गहस्त वानरां। दांत खावोनि करकरां। हाणी कपींद्रा मुष्टिघात ॥८४॥ माझें खड्ग वानराहातीं। देखोनि प्रज्वळला चित्तीं। हनुमान हाणी मुष्टिघातीं। सर्वशक्तीं साटोपें ॥८५॥ हनुमंतासीं मुष्टिघात। हाणितां झणणिला हात। त्रिशिरा चांचरी जात। स्वयें सांवरीत विव्हळ ॥८६॥ लागतां त्याचा मुष्टिघात। डळमळीना हनुमंत। खड्गहस्तें क्षणाआंत। केला निःपात तिहीं शिरां ॥८७॥

स तेन खड्गेन महाशिरांसि कपिःसमस्तानि सकुंडलानि।
क्रुद्धः प्रचिच्छेद तदा हनूमास्त्वष्टुःसुतस्येव शिरांसि शक्रः ॥३१॥
तस्मिन्हते देवरिपौ त्रिशीर्षे हनूमता शक्रपराक्रमेण।
नेदुः प्लवंगाः प्रचचाल भूमी रक्षांसि सर्वाणि विदुद्रुवुश्च ॥३२॥
हतं त्रिशिरसं दृष्ट्वा तथैव च महोदरम्। हतौ प्रेक्ष्य दुराधर्षै देवांतकनरांतकौ ॥३३॥
चुकोप परमामर्षी मत्तो राक्षसपुंगवः। जग्राहार्चिष्मतीं चापि गदां सर्वायसीं तदा ॥३४॥

खड्ग घेवोनि हनुमंतें। छेदिलें त्रिशिऱ्याचे तिहीं शिरांतें। समुकुट सकुंडलांतें। लखलखीत पाडिली ॥८८॥ विरूपाचीं महाशिरें। जैसीं कां छेदिलीं इंद्रे। तैसीं त्रिशिऱ्याचीं शिरें। रणीं कपींद्रें पाडिलीं ॥८९॥ गिरिशृंगे उद्भट[६]। शिरें शोभती लखलखाट। वटारिले नेत्रवाट।

शब्दार्थ : १. झळकून, २. सिंह, ३. तुटून पडणारा तारा, ४. प्राप्त होऊन, ५. प्रबळ.

पाडिले स्पष्ट रणरंगीं ॥९०॥ त्रिशिरा सुरवरांचा वैरी। हनुमंतें रणमारीं। शिरें छेदून शस्त्रधारीं। धरेवरी पाडिला ॥९१॥ सुरवर करिती जयजयकार। नामें गर्जती वानर। धाकें पळती निशाचर। रणीं महाशूर मारिले ॥९२॥

त्रिशिराचा बंधू महापार्श्व यांचे आगमन : त्रिशिरा मारिला महाशूर। मारिला बंधु महोदर। देवांतक राजकुमर। मारिला वीर नरांतक ॥९३॥ देखोनि सुहृदांचा[1] मार। महापार्श्व महावीर। दुःखशोकें अति जर्जर। चढला पूर मोहाचा ॥९४॥ महापार्श्व मोहान्वित। स्वयें होवोनि सावचित्त। रणीं राहोनि ध्यानस्थ। कर्तव्यार्थ विचारी ॥९५॥ पळोनि जातां लंकेआंत। पुत्रशोकें लंकानाथ। अवश्य करील माझा घात। कीं अपमानांत गांजील ॥९६॥ मुखीं लावील मसीचा टिळा। रासभारोहणीं[2] गोमयगोळा। उपानहांच्या[3] माळा गळां। होईल सोहळा शिमग्याचा ॥९७॥ ऐसें अपमानें जिणें। त्याहून श्रेष्ठ रणीं मरणें। निमाल्या निजमोक्ष पावणें। जिंतल्या जिणें जगद्वंद्व ॥९८॥ ऐसें विचारोनि जाण। महापार्श्व विचक्षण[4]। वानरीं करावया रण। स्वयें आपण परतला ॥९९॥

चुकोप सुमहातेजा महापार्श्वो महाबल। जग्राह महतीं घोरां गदां सर्वायसीं तदा ॥३५॥
हेमपट्टपरिक्षिप्तां मांसशोणितफेनिलाम्। विरोचमानां विपुलां शत्रुशोणिततर्पिताम् ॥३६॥
गदामादाय संक्रुद्धो महापार्श्वो महायशाः। हरीन्समभिदुद्राव युगांताग्निरिव ज्वलन् ॥३७॥

महापार्श्व-ऋषभ यांचा संग्राम : निमाले देखोनि स्वजन। वानरेंसी करावया रण। महापार्श्व स्वयें आपण। गदा घेऊन धांविन्नला ॥१००॥ अवघी तिख्याची लखलखित। अग्निप्राय धगधगित। सुवर्णबंदी रत्नांकित। गदा शोभत अति शोभा ॥१॥ शत्रुशोणितें[5] न्हाणिली। अरिशिरःकमळें[6] पैं पूजिली। रिपुमांसें तृप्त केली। गदा घेतली साटोपें ॥२॥ करावया भूतांची बोहरी। प्रळँयाग्नि जैशापरी। तैसी गदा घेवोनि करीं। वानरांवरी धांविन्नला ॥३॥ येतां देखोनि वानरांत। ऋषभ वीर वरुणसुत। उडोनियां संमुख येत। करावया घात महापार्श्वा ॥४॥

ऋषभस्तु समुत्पत्य वानरो वरुणात्मजः। महापार्श्वं समासाद्य तस्थौ तस्याग्रतो बली ॥३८॥
तं पुरस्तात्स्थितं दृष्ट्वा वानरं पर्वतोपमम्। आजघानोरसि क्रुद्धो गदया वज्रकल्पया ॥३९॥
स तथाभिहतस्तेन गदया वानरर्षभः। भिन्नवक्षाः समाधूतः सुस्राव रुधिरं बहु ॥४०॥

महापार्श्वाचा वध : येतां देखोन महापार्श्वासी। ऋषभवीर अति वेगेंसीं। उडोनि आला तयापासीं। संग्रामासीं साटोपें ॥५॥ जैसा पर्वताचा कडा। तैसा वानर आला पुढां। महापार्श्व कोपला गाढा। उठावला गाढा गदेसीं ॥६॥ गदा घेवोनि कोपेंकरीं। ऋषभ हाणितला उरावरी। घायें पडिला धरेवरी। उभाचि रुधिरीं न्हाणिला ॥७॥ घायासरसा विसंज्ञ[7]। ऋषभ पडला अचेतन। चिरकाळें स्वयें आपण। संज्ञा संपूर्ण पावला ॥८॥

स संप्राप्य चिरात्संज्ञामृषभो वानरर्षभः। क्रुद्धो विस्फुरमाणौष्ठो महापार्श्वमवेक्षत ॥४१॥
गृहीत्वा तां गदां वीरो व्याविध्य च पुनः पुनः। मत्तानीकं महापार्श्वं जघान रणमूर्धनि ॥४२॥
स तया गदया भिन्नो विशीर्णदशनेक्षणः। निपपात महापार्श्वो वज्राहत इवाचलः ॥४३॥
तस्मिन्हते भ्नातरि रावणस्य तन्नैर्ऋतानां बलमर्णवाभम्।
मुक्तायुधं केवलजीवितार्थी दुद्राव भिन्नार्णवसन्निकाशम् ॥४४॥

संज्ञा[8] लाहोनि[8] वानर। करावया रणप्रत्युपकार। दृढ करोनियां विचार। केला चमत्कार तो ऐका ॥९॥ ऋषभ वीर रणमर्गळा[9]। पुच्छें कंठी लावोनि कळा। गदा हिरोनियां तत्काळा। गेला निराळा[10] उडोनी ॥११०॥ वानर गदा हिरोनि नेतां। विस्मयो महापार्श्वचित्ता। आणिक

शब्दार्थ : १. आप्तांचा, २. गाढवावर बसवून, ३. जोड्यांच्या, ४. शहाणा, ५. शत्रूच्या रक्ताने, ६. शत्रूंच्या शिरोरूपी कमळांनी, ७. मूर्च्छित, ८. सावध होऊन, ९. रणकुशल, १०. आकाशात.

शस्त्र घ्यावें हाता। तंव गदाघाता ठोकिलें॥११॥ कोपें कपि कांपे थरथरां। दांत खावोनि करकरां। गदा भोवंडोनि गरगरां। निशाचरा ठोकिलें॥१२॥ गदाघात वाजतां शिरीं। दांत खावोनि चकचूरी। नेत्र पडिले बाहेरी। धरेवरी पडियेला॥१३॥ महापार्श्वे रणव्युत्पत्तीं। गदा पडताळिली[1] हातीं। त्याची भोंवली त्याभोंवती। पडिला क्षितीं घायें एकें॥१४॥ शंबराचें शिर छेदून। जैसें कां करी प्रद्युम्न। तैसेंचि महापार्श्वा जाण। रणमर्दन केले ऋषभें॥१५॥ रावणाचा बंधु जाण। महापार्श्व प्रिय प्रधान। त्याचा रणीं घेतला प्राण। पलायमान राक्षस॥१६॥ प्रळयीं खवळल्या सागर। त्याचें जेंवी नावरे नीर[2]। तेंवी निमाल्या पांचही वीर। राक्षसभार भंगला॥१७॥ देवांतक महोदर। नरांतक त्रिशिरा वीर। महापार्श्व मारिला शूर। राक्षस समग्र पळाले॥१८॥ चौघीं मारिले पांचही जण। अतिकाय करील निर्वाण[3]। एका जनार्दना शरण। तेंही निरूपण अवधारा॥१९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां देवांतकत्रिशिरादिवधो नाम त्रिंशत्तमोऽध्यायः॥३०॥ ओंव्या॥११९॥ श्लोक॥४४॥ एवं ॥१६३॥

## अध्याय एकतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### अतिकाय राक्षसाचा वध

चौघा वानरांनी तिघा राजकुमारांना व दोन राक्षसांना मारिले : चौघे मिळोनि वानर। तिघे रावण राजकुमर। महापार्श्व आणि महोदर। पांचही महाशूर मारिले॥१॥ आम्ही म्हणों हे वानर। पालेखाइरे वनचर। परी हे निधडे महाशूर। दुर्धर वीर मारिले॥२॥ सखे बंधु मारिले तिन्ही। पितृव्य[4] निमाले दोन्ही। तें देखोनियां नयनीं। अतिकाय मनीं क्षोभला॥३॥

अतिकायाचे क्रोधाने आगमन : मारिले देखोनि स्वजन। अतिकाय कोपायमान। रविप्रभेंसीं समान। देदीप्यमान तेजस्वी॥४॥ एवढिया तेजासीं कारण। ब्रह्मदत्त[5] वरद[5] संपूर्ण। प्राकृताचेनि[6] हातें मरण। सर्वथा जाण न पावसी॥५॥ ब्रह्मवरदें बळवंत। देवदानवदैत्यघात। स्वयें करी रणाआंत। निजपुरुषार्थ मिरवोनी॥६॥ सारथ्यासी स्वयें सांगत। जेथें आहे रघुनाथ। वानरांसी न लावूं हात। रणीं रघुनाथ मारावया॥७॥

अतिकायाचा विचार : पाठीसीं असतां श्रीरघुनाथ। रणीं वानर नाटोपत। तेथवरी प्रेरिला रथ। त्यासी रणांत मारावया॥८॥ वानरांचें बळकारण। मुख्य श्रीरामलक्ष्मण। ते मारिल्या दोघे जण। वानरगण निमाले॥९॥ अखया मारून जाळिलें नगर। देवांतक नरांतक त्रिशिर। महापार्श्व महोदर। सुहृद समग्र निर्दळिले॥१०॥ ते व्हावया उत्तीर्ण[7]। सुखी करावया रावण। रणीं मारीन रामलक्ष्मण। तरी मी जाण अतिकाय॥११॥ रणीं मारिल्या श्रीरामचंद्र। मारणें न लागती वानर। तेंही विषयींचा विचार। ऐक साचार सांगेन॥१२॥ श्रीराम वृक्ष लक्ष्मण दंड। हनुमान एक मध्यबिंड। सुग्रीवादि शतशाखा प्रचंड। विस्तार उदंड कपिसेना॥१३॥ सीता सुंदर सुमनफळ। रावण भुलला तत्काळ। हित सांगतांही सकळ। तो अळुमाळ[8] उमजेना॥१४॥ रणीं मारिल्या रघुवीर। निमालें हनुमान सौमित्र। निमाले सुग्रीवादि वानर। सीता सुंदर स्ववश॥१५॥ ऐसी करावया ख्याती। अतिकाय मी रणार्थी। घायें मारीन रघुपती। बाणावर्तीं वर्षोनी॥१६॥ रणीं मारावया रघुनाथ। मी अतिकाय आलों येथ।

शब्दार्थ : १. घेतली, २. उदक, ३. निकराचे युद्ध, ४. चुलते, ५. ब्रह्मदेवाने दिलेला वर, ६. सामान्य मनुष्यादिकांचे, ७. त्यांचे उतरायी होण्याकरिता, ८. यत्किंचितही.

विस्फारोनि चापहस्त। रणीं गर्जत साटोपें ॥१७॥ मुकुट कुंडलें वीरकंकणें। अतिकाय शोभला तेणें। बाहु अंगदें अंगत्राणें। जेंवी कां किरणें श्रीसूर्य ॥१८॥

धनुष्याच्या टणत्काराने वानरसैन्य त्रस्तः धनुर्ष्यी करितां टणत्कार। दुमदुमिले गिरिकंदर। भूकंपें उलथती सागर। भेणें वानर पळाले ॥१९॥ अतिकाय देखोनि दुर्धर। भयें त्रासिले वानर। पळोन आले ते समग्र। श्रीरघुवीर ठाकोनी ॥२०॥ जो शरण्य[1] शरणागता[1]। टाकून आले त्या रघुनाथा। अभय देतांचि समस्तां। कपि स्वस्थता पावले ॥२१॥ अतिकाय तो अति दुर्धर। रथीं बैसला दिसे अत्युग्र। त्यातें देखोनि रघुवीर। विस्मय थोर पावला ॥२२॥

श्रीरामांना बिभीषण अतिकाय राक्षसाची माहिती सांगतो : स्वयें श्रीरामें आपण। पाचारोनि बिभीषण। म्हणे पैल हा वीर येतो कोण। रणप्रवीण निःशंक ॥२३॥ हाकाऊन[2] बिभीषण। स्वयें पुसे रघुनंदन। पर्वतप्राय अति दारुण। येतो कोण तें सांग ॥२४॥ धनुर्धारी पिंगाक्ष। रथीं बैसला अति दक्ष। येतो आमचें धरून लक्ष। रणाध्यक्ष प्रतापी ॥२५॥ रथीं जुंपिले अश्व सहस्र। दोन शतें वीस तूणीर। असि चाप गदा मुद्गर। त्रिशूळ तोमर रथस्थ ॥२६॥ छत्र पताका युग्मचामरीं। ध्वजीं मुक्त माळाझल्लरी। राहूचें शिर ध्वजावरी। रणमहामारी ब्रिदाइत ॥२७॥ बाहुअंगदें मुकुट शिरीं। कुंडलांचें तेज भारी। लखलखी मुखावरी। जेंवी भास्करीं निजकिरण ॥२८॥ हेमसन्नद्ध[3] चापबाण। रथीं बैसला निःशंक पूर्ण। मजसंमुख यावया जाण। आंगवण केंवी यासीं ॥ २९ ॥ तेच विषयींचें निरूपण। स्वयें सांगतो बिभीषण। अतिकायाची आंगवण। बळ संपूर्ण वरदोक्ती ॥३०॥

भीमकर्मा महातेजा रावणो राक्षसाधिपः। तस्यैष वीर्यवान्पुत्रो रावणप्रतिमो बली ॥१॥
वृद्धसेवी श्रुतिधरः सर्वास्त्रविदुषां वरः। अश्वपृष्ठे नागपृष्ठे खड्गे धनुषि कर्षणे ॥२॥
भेदे सांत्वे च दाने च न्याये मंत्रे च संमतः। तनयं विद्धि मालिन्या अतिकायमिमं विदुः ॥३॥

अतिकायाची जन्म-कथा व गुणवर्णन : रावण जाला लंकापती। महामालिनीगर्भसंभूती। याची जाली पैं उत्पत्ती। नामें निश्चितीं अतिकाय ॥३१॥ अतिकाय वीर विख्यात। रावणासमान बळवंत। परी हा साधुसेवी अति विनीत। आणि श्रवणवंत सच्छास्त्रीं ॥३२॥ जाणे रथपती चक्रभ्रमण। गजवाजीआरोहण। खड्ग[4] पदाति करावया रण। आंगवण अतिकाया ॥३३॥ शूळ त्रिशूळ मुद्गर। फरश पट्टिश तोमर। अचुकसंधानी धनुर्धर। प्रवीण शस्त्री अतिकाय ॥३४॥ भेदाचें परिमार्जन। लोभदंभाचें सांत्वन। दान देवोनि उदार पूर्ण। विनीतपण सर्वांसीं ॥३५॥ निर्दळोनि अनीती। दृष्टीपुढें ओळंगे नीती। विचाराविषयीं हा बृहस्पती। सांगे सुखोक्तिसंवाद ॥३६॥ ऐसा सर्वार्थीं निपुण। संग्रामीं जिंतले सुरगण। मशकप्राय करोनि जाण। इंद्र संपूर्ण गांजिला ॥३७॥ संग्रामी अति प्रखर। प्रतापतेजें जैसा रुद्र। सर्वार्थीं अति दुर्धर। रावणकुमर अतिकाय ॥३८॥

अनेनाराधितो ब्रह्मा तपसा भावितात्मना। अस्त्राणि चास्य दत्तानि रिपूणां च पराजये ॥४॥
सुरासुरैरवध्यत्वं दत्तमस्य स्वयंभुवा। एतच्च कवचं दिव्यं रथश्च रविभासुरः ॥५॥
एतेन शतशो देवा दानवाश्च पराजितः। एषोतिकायो बलवान्राक्षसानामथर्षभः ॥६॥
तदस्मिन्क्रियतां यत्नः क्षिप्रं पुरुषपुंगव ॥७॥

ब्रह्मयाचे वरदानाने अतिकायाला अभेद्यकवचाची प्राप्ती झाल्याचे कथन : पूर्वीं अतिकाय निरन्न। करूनि ब्रह्मयाचें आराधन। ब्रह्मा करोनि सुप्रसन्न। ब्रह्मवरदान पावला ॥३९॥ पराभवून शत्रुसमुदाव। नित्य संग्रामीं निजविजय। ऐसा शस्त्रअस्त्रसमुदाव। ब्रह्मदेव स्वये

शब्दार्थ : १. शरण आलेल्यांचे रक्षण करणारा, २. हाक मारून, बोलावून, ३. सुवर्णबद्ध, ४. तरवारीने युद्ध.

अर्पी ।।४०।। सुरासुरांसी करितां रण। सर्वथा युद्धी न ये मरण। अवध्यत्वाचें वरदान। दिधले आपण ब्रह्मदेवें ।।४१।। अभेद्य कवच अभेद्य रथ। ब्रह्मा देत हर्षयुक्त। तेणें देवदानव समस्त। रणीं गांजित अतिकाय ।।४२।। वरदबळें बळोन्मत्त। अतिकाय येतो गर्जत। शीघ्र याच्या वधार्थ। यत्न निश्चित करावा ।।४३।। अभेद्य कवच अनिवार्य बाण। येणें बळें अतिकाय जाण। येतो तुजसीं करावया रण। आंगवण वरदाची ।।४४।। याचे न सुटतां बाण। प्रयत्न देखावा आपण। ऐसें बोलता बिभीषण। रघुनंदन हांसिला ।।४५।।

श्रीरामांची उक्ती व अतिकायाचा धनुष्याचा टणत्कार : ब्रह्मवरद तें बापुडें। अतिकाय मशक घुंगुरडें। त्याचें भय वाडेंकाडें[1]। काय मजपुढें सांगसी ।।४६।। माझा सुटलिया बाण। कळिकाळाचा घेईल प्राण। अतिकाय तें बापुडें कोण। मरेल आपण निमेषार्थे ।।४७।। अतिकाय प्रेरून रथ। आला वानरसैन्याआंत। धनुष्य टणत्कारोनि तेथ। असे गर्जत रणरंगी ।।४८।। रणरंगी वारंवार। सिंहनाद करितां थोर। तेणें क्षोभोनि वानरवीर। युद्धा सत्वर मिसळले ।।४९।। अतिकाय अति भयंकर। देखोनि श्रेष्ठ श्रेष्ठ वानर। युद्धा मिसळले दुर्धर। शिळाशिखरद्रुमपाणी[2] ।।५०।। कपि हाणितां द्रुमपाषाण। अतिकाय त्यांसी न विंधी बाण। हीन दीन वानरें जाण। मारिल्या कोण पुरुषार्थ ।।५१।। वानर वनचर ते किती। पालेखाईर यांची जाती। त्यांसी मारिल्या कोण कीर्तीं। रणीं रघुपती मारीन ।।५२।।

वानरांकडे दुर्लक्ष करून अतिकायाची श्रीरामांवर चाल : वानरांसी करणे रण। हेंचि मज उणेपण। मुख्य धूर मी मारीन। रघुनंदन संग्रामी ।।५३।। वानरांचे द्रुमपाषाण। अतिकाय मानून तृण। श्रीरामासीं करावया रण। आला आपण साटोपें ।।५४।। वानर बापुडे ते किती। त्यावरी धनुष्य न धरी हातीं। रणीं मारावया रघुपती। संग्रामशक्ती मज आहे ।।५५।। निवारून द्रुम पाषाण। उपेक्षून वानरगण। श्रीरामासीं करावया रण। आला गर्जोन अतिकाय ।।५६।। घेवोनियां धनुष्य बाण। युद्धा आलों मी आपण। ज्यासी असेल आंगवण। तेणें मजसीं रण करावें ।।५७।। तुम्हीं माजी कोणप्रती। जरी असेल संग्रामशक्ती। तरी तेणें येवोनि मजप्रती। रणव्युत्पत्तीं भिडावें ।।५८।।

ततस्य वाक्यं ब्रुवतो निशम्य चुकोप सौमित्रिरमित्रहंता।
अमृष्यमाणश्च समुत्पपात जग्राह बाणांश्च ततः प्रहस्य ।।८।।
पुरस्ताच्चातिकायस्य विचकर्ष महाधनुः पूरयित्वा महीं शैलानाकाशं सागरं दिशः ।।९।।
ज्याशब्दो लक्ष्मणस्याग्रे त्रासयन्रजनीचरान्। विसिस्मिये महातेजा राक्षसेंद्रसुतो बली ।।१०।।
अथातिकायः कुपितो दृष्ट्वा लक्ष्मणमग्रतः। आदाय शिशितं बाणमिदं वचनमब्रवीत् ।।११।।

अतिकायाची दर्पोक्ती : ज्यासीं असेल आंगवण। तेणें मजसीं करावें रण। ऐकोनि अतिकायाचें वचन। आलें स्फुरण लक्ष्मणा ।।५९।। वंदून रामाचें चरण। सज्जोनियां धनुष्यबाण। करून स्वानंदे उड्डाण। आला गर्जोन सौमित्र ।।६०।। सबळ बळें अति गाढा। दृढ सज्जोनियां मेढा[3]। आला अतिकायापुढां। रणीं निधडा सौमित्र ।।६१।। करितां धनुष्यीं टणत्कार। भूकंप सपर्वतसागर। नादें उठत अंबर। गिरिकंदर दुमदुमिलें ।।६२ ।। टाळीं बैसलीं दिग्गजांसी । नाद कोंदला दशदिशीं। भय सुटलें राक्षसांसी। कासाविसी ज्या घोषें[4] ।।६३।। ऐकतां ज्याघोष दारुण। अतिकायाचा जाऊं पाहे प्राण। उतटलें अंतःकरण। निधडा पूर्ण सौमित्र ।।६४।। संमुख निधडा लक्ष्मण। देखतां अतिकाया कोप पूर्ण। धनुष्यीं सज्जोनियां

शब्दार्थ : १. कौतुकाने, २. शिळा, शिखरे आणि वृक्ष हातात घेऊन, ३. धनुष्याची दोरी, ४. धनुष्याच्या दोरीच्या.

बाण। रागें गर्जोन बोलत॥६५॥ मागां सांडून रघुकुळटिळक। पुढें आलासी तूं बाळक। माझी वाजतांचि हाक। मरसी नि:शेख घायेंवीण॥६६॥ धरोनियां अभिमान। मजसीं करूं म्हणसी रण। माझे सहावया निर्वाणबाण। आंगवण तुज कैंची॥६७॥ सुटतां मुद्गाणशैली। तुज पळतां रणकल्लोळीं। लपतां भूतळीं कीं नभ:स्थळीं। शोधून होळी करतील॥६८॥ हेमपत्री[१] सुतीक्ष्ण बाण। सुटल्या घेती तुझा प्राण। मजसीं करितां रणांगण। वृथा मरण पावसी॥६९॥ सांडोनियां धनुष्यबाण। शीघ्र पळावें आपण। तुज म्यां दिधलें जीवदान। सर्वथा जाण मारींना॥७०॥ त्यजून संग्रामसंकट। सांडून युद्धकडकडाट। तुज म्यां दिधली धर्मवाट। घडघडाट पळावें॥७१॥

लक्ष्मणाचे अतिकायाला प्रत्युत्तर : अतिकायाच्या निंद्य उत्तरीं। कोप न येचि सौमित्रीं। अगाध शांतीची निजथोरी। शब्दचातुरी अवधारा॥७२॥ स्वमुखें बोलतां निजकीर्ती। ते तंव शूरासी अपकीर्ती। शब्दचातुर्यव्युत्पत्तीं। काय पुरुषार्थी जालासी॥७३॥ बोलतां शब्दाची आंगवण। त्वां काय जिंतिलें रणांगण। व्यर्थ बोलाचें दादुलपण[२]। निर्लज्ज पूर्ण तूं एक॥७४॥ जे बडबडती वितंड। त्यांतें म्हणती केवळ भांड। भंडपुराण[३] तुझें तोंड। तूं रणनिर्लंड[४] निर्लज्ज ॥७५॥ घेवोनियां धनुष्यबाण। संमुख उभा मी लक्ष्मण। बोलासारखी आंगवण। करून आपण दावावी॥७६॥

बालोऽयमिति विज्ञाय न चावज्ञातुमर्हसि। बोलाऽवा यदि वा वृद्धो मृत्युं जानाति संयुगे॥

बालत्व मानिलें कुमारासीं। तेणें मर्दिलें लवणासुरासी। तेंवी या बालत्वें राक्षसीं। रणमर्देसी मर्दीन॥७७॥ नवग्रहांचे बळ घटासीं। तरी युद्ध न करवे पाषाणासीं। तेंवी तूं शूर देवदैत्यांसीं। संग्राम मजसीं न करवे॥७८॥ मज मानूनि बाळपण। सर्वथा न करावें हेळण[५]। माझ्या बाळपणाचें लक्षण। सावधान अवधारीं॥७९॥ धाकुटी दीपकळिका जैसी। स्वयें लावितां वळचणीसी। जाळीत उठे पुरनगरांसी। गिरिदुर्गांसीं भस्मांत॥८०॥ तैसें माझें धाकुटपण। संग्रामी राक्षसां कुळकंदन। मारीन इंद्रजित रावण। तेथें तूं कोण क्षुद्र मशक[६]॥८१॥ माझे सुटल्या निर्वाणबाण। अतिकाया तुज राखेल कोण। क्षणार्धें घेईन तुझा प्राण। तुझी आंगवण दावीं पां॥८२॥ ऐसें बोलतां लक्ष्मण। अतिकाय कोपला दारुण। काढोनि निर्वाणबाण। सौमित्र संपूर्ण विंधिला॥८३॥

लक्ष्मणस्य वच: श्रुत्वा हेतुमत्परमार्थवत्। अतिकाय: प्रचुक्रोध बाणं चास्य समाददे॥१३॥
तमापतंतं सौमित्रिस्त्रिधा चिच्छेद लाघवात्। रावणि: परमामर्षी शरैरेनमुपाद्रवत्॥१४॥
तत: शरसहस्रेण संस्थाप्य रघुनंदनम्। बिभीषणं च सामात्यं शरवर्षैर्महाभुज:॥१५॥
अर्धचंद्रेण चिच्छेद लक्ष्मण: परवीरहा। ततो विद्याधरा: सर्वे देवा देवर्षयस्तथा॥१६॥
गुह्यकाश्च महात्मानस्तद्युद्धं ददृशुस्तदा॥१७॥

अतिकाय व लक्ष्मणाचे युद्ध : आपली स्तुति करणें आपण। हें शूरासी निंद्य दूषण। ऐसें धर्म युक्तवचन। स्वयें लक्ष्मण बोलिला॥८४॥ हृदयीं भेदला वाग्बाण। तेणें कोपें अतिकाय आपण। घेवोनियां निर्वाणबाण। रणीं लक्ष्मण विंधिला॥८५॥ लक्ष्मणें लघुलाघवेंकरीं[७]। बाण छेदोनि वरच्यावरी। त्रिधा[८] भेदून अंबरी। धरेवरी पाडिला॥८६॥ निर्वाणबाण रणाआंत। करावया लक्ष्मणाचा घात। तो बाण येणें केला व्यर्थ। धन्य पुरुषार्थ सौमित्रा॥८७॥ श्रीराम आणि लक्ष्मण। दोघांही निधडी[९] आंगवण। दोघे योद्धे रणप्रवीण। संग्रामी जाण नाटोपती॥८८॥ ठाकून मारिल्या बिभीषण। न लगे जुंझ न लगे भांडण।

शब्दार्थ : १. सोनेरी पिसाऱ्याचे, २. मोठेपणा, ३. नुसती बडबड करणारे, ४. रणाविषयीं नपुंसक, ५. उपहास, ६. क्षुल्लक, ७. मोठ्या चातुर्याने, ८. तीन ठिकाणी, ९. मोठी.

दोघे स्वयें सांडिती प्राण। तैसें विंदान मांडिलें॥८९॥ ब्रह्मदत्ताचे सहस्र बाण। अनिवार्य अति दारुण। विंधोनि गोंविला लक्ष्मण। मारून बिभीषण शरवर्षे॥९०॥ शरणागता वज्रपंजर। सत्यशस्त्री लक्ष्मण वीर। सोडून बाण अर्धचंद्र। शरें शर छेदिला॥९१॥ बाण येतांचि कडाडीं। अतिकाय अतिशयें हडबडी[1]। डोळां चालली झांपडी। पडली मुर्कंडी घायेंवीण॥९२॥ अतिकाया ब्रह्मवरदान। प्राकृतीहातीं न ये मरण। अवतारपुरुषाहातीं जाण। दिनांतीं प्राण जातील॥९३॥ न होतां सूर्यास्तमान।अतिकायासी न मारीच बाण। पाळोनियां ब्रह्मवरदान। आला परतोन तूणीरीं[2]॥९४॥ लक्ष्मणाचें रण विचित्र। पाहूं आले सुरासुर। सिद्ध चारण विद्याधर। यक्ष किन्नर गुह्यक॥९५॥ देवऋषि नारदमुनी। युद्ध पाहूं आला धांवोनी। हरिखें नाचे उपरमोनी[3]। धन्य करणी सौमित्रा॥९६॥ अनिवार ब्रह्मवरदबाण। घाय निवारोनि संपूर्ण। शरणागता संरक्षण। धन्य लक्ष्मण पैं योद्धा॥९७॥ बाण निवारोनि समस्त। स्वस्थ राखोन शरणागत। न लावितां त्यासी आघात। पाडी मूर्च्छित अतिकाया॥९८॥ युद्ध पहावया पडिपाडें[4]। पाहूं लागला लंकेपुढें। नारद हरिखें नाचे उडे। वार्डेकोडें[5] गर्जत॥९९॥ स्वर्गीं गर्जती सुरवर। ऋषी करिती जयजयकार। नामें गर्जती वानर। धन्य सौमित्र रणयोद्धा॥१००॥ अतिकाय उघडी नयन। तंव बाण गेला परतोन। दुर्धर होवोनि कोपायमान। निर्वाणरण मांडिलें॥१॥ लक्ष्मणाचे पंच प्राण। घ्यावया सोडिलें पांच बाण। निश्चियाचें निजनिर्वाण[6]। परम दारुण संग्रामी॥२॥ अतिकायाचे पांचही बाण। छेदून सांडी लक्ष्मण। जेंवी सर्पातें गरुड जाण। छेदी आपण नखाग्रें॥३॥ छेदून त्याचें शरसंधान। स्वयें लक्ष्मण आपण। तेजस्वी घेऊन बाण। वोढी[7] काढून विंधिला॥४॥ कडकडाटें येवोनि बाण। ललाटीं लागला दारुण। तेथेंचि जाला निमग्न। जेंवी सर्पागमन वारुळीं॥५॥ अतिकायें करितां निवारण। त्याचे छेदोनियां बाण। जाला ललाटीं निमग्न। कंपायमान राक्षस॥६॥ रुधिराचिया धारा। रक्तें न्हाणिलें निशाचरा। घायें दंडिले महावीरा। रणीं थरथरां कांपत॥७॥ जेंवी त्रिपुराचें त्रिपुर। रुद्र बाणीं करी जर्जर। तैसाच येथें निशाचर। लक्ष्मणें दुर्धर गांजिला॥८॥ बाणमात्रें महाबळी। लोळविला रथातळीं। घायें मेळविला धुळी। आतुर्बळी सौमित्र॥९॥

चिंतयामास चाश्वास्य विश्रम्य च महाबला:। साधुमुक्तेन बाणेन श्लाघनीयोऽसि मे रिपु:॥१८॥
स्यंदनोपस्थमादाय चापमादाय चोत्तमम्। एकत्रीन्पंचसप्तेति सायकान्राक्षसर्षभ:॥१९॥
ततस्तान्राक्षसोत्सृष्टाञ्शरौघान्राघवानुज:। असंभ्रांत: प्रविच्छेद निशितैर्बहुभि: शरै:॥२०॥

लक्ष्मण व अतिकाय यांचे अस्त्रयुद्ध : अतिकाय शरसमेळीं। लोळविला रथातळीं। मूर्च्छा भाजून[8] ते काळीं। झाला महाबळी सावध॥११०॥ माझी निवारोनि शरसुटी[9]। बाण भेदिला लल्लाटीं। धन्य धनुर्वाडा तूं श्रेष्ठीं। वीरजगजेठी मी मानीं॥११॥ देव दानव दैत्य पन्नग। सदा संग्रामीं मजसी विमुख। त्याही मज त्वां लाविला धाक। योद्धा नेटक[10] मी मानीं॥१२॥ ऐसा शत्रूचा घेतां गुण। अतिकाय कोपला दारुण। घेवोनियां निर्वाणबाण। विंधी आपण साटोपें॥१३॥ प्रथम विंविधला बाण एक। लक्ष्मणें तोडिला तो देख। सवेंचि विंधीं पांच आणिक। तेही नि:शेख[11] तोडिले॥१४॥ सवेंचि विंधिले बाण तीन। तेही सांडिले छेदून। आणीक विंधितां सात बाण। तेही तोडून सांडिले॥१५॥ एक तीन पांच सात। बाण छेदिले समस्त। अतिकाय तेणें कोपान्वित। दांत खात संग्रामीं॥१६॥

तान्शरान्युधि संप्रेक्ष्य निकृत्तान्रावणात्मज:। चुकोप त्रिदशेंद्रारिर्जग्राह च शितं शरम्॥२१॥

---

शब्दार्थ : १. घाबरला, २. भात्यामध्ये, ३. थांबोन, ४. तुलनेने, ५. कौतुकाने, ६. पराकाष्ठा, ७. धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून, ८. सावरून, ९. बाणवर्षांव, १०. शूर, श्रेष्ठ., ११. सर्व.

तेन सौमित्रिमायातमाजघान स्तनांतरे। सोऽ तिविद्धो बलवता लक्ष्मणो लक्ष्मिवर्द्धनः॥२२॥
सुस्राव रुधिरं भूरि मदमत्त इव द्विपः। स चकार तदात्मानं विशल्यं सहसा विभुः॥२३॥

अतिकायाचे निर्वाणशर। लक्ष्मणें छेदिले समग्र। तेणें क्षोभोनि रावणकुमर। शर दुर्धर सज्जिला॥१७॥ तेणें बाणेंसीं गर्जोन। हृदयीं विंधिला लक्ष्मण। बाण भेदलियाही संपूर्ण। सौमित्र जाण न डंडळी[1]॥१८॥ सुटलिया रुधिरधारा। शोभे जैसा रणनोवरा। रणीं गर्जतां सौमित्रा। निशाचरा आकांत॥१९॥ जेंवी महागज मदच्युत[2]। डुल्लत विचरे वनाआंत। तेंवी लक्ष्मण रुधिरोक्षित। स्वानंदें डुल्लत रणरंगी॥१२०॥ हृदयीं रुपला जो बाण। तो स्वयें उपडोनि आपण। हृदय निःशल्य[3] केलें जाण। रणप्रवीण सौमित्र॥२१॥ जो हृदयींचें शल्य फेडी। त्याचे तोडरीं विघ्नकोडी। प्रपंचपरमार्थविजयगुढी। उभवी रोकडी तिहीं लोकीं॥२२॥ जो शल्य फेडी हृदयाआंत। त्यासी रणरंगी परमार्थ। तोचि विजयी संग्रामांत। जो करी घात अहंममतेचा॥२३॥ यापरी तो वीर धीर लक्ष्मण। हृदयींचें सर्व शल्य काढून। अतिकायाचा घ्यावया प्राण। अस्त्रसंधान संयोजी॥२४॥ निधडा धनुर्वाडा वीर। रणव्युत्पत्तीं शूर सौमित्र। अस्त्र मंत्र बीजाक्षर। सतेज शर सज्जिला॥२५॥

जग्राह च शरं तीक्ष्णं तमस्त्रेणाभिसंदधे। आग्नेयेन महाबाहुः सर्वा विद्योतयन्दिशः॥२४॥
अतिकायाय चिक्षेप कालदंडमिवांतकः। दृष्ट्वा तु तं महाबाहुः शरं जग्राह कोपनः॥२५॥
उत्ससर्ज तदा बाणं दीप्तं सूर्यास्त्रसंयुतम्। तावुभावंबरे बाणावन्योन्यमभिजघ्नतुः॥२६॥
तावन्योन्यं विनिर्भिद्य पेततुर्धरणीतले॥२७॥

ब्रह्मवरदानामुळे लक्ष्मणाचे बाण व्यर्थ ठरतात : सौमित्र युद्धीं सावधान। घ्यावया अतिकायाचा प्राण। अग्निअस्त्र सज्जून बाण। विंधी आपण साटोपें॥२६॥ बाण सुटतां तेजोराशी। प्रभा न माय आकाशीं। अतिकाय देखोनि त्यासी। सूर्यास्त्रासीं विंधिलें॥२७॥ अग्नि सूर्य तेजोराशी। बाण भिडतां आकाशीं। तेज मिळालें तेजासीं। अस्त्रें अस्त्रासी निवारण॥२८॥ पहातां पहातां वाडेंकोडें। तेजींतेज मिनलें[4] गाढें। दोहींचीं निर्वीर्य कांडें[5]। रणीं दुखंडे तीं पडलीं॥२९॥ दोनी अस्त्रें झालीं निराकार। दोघे विसावले वीर। रणीं क्षोभोनि निशाचर। इषीकास्त्र[6] सोडिलें ॥१३०॥ रणीं क्षोभोनि निशाचर । रागें सोडिलें इषीकास्त्र। लक्ष्मण निधडा धनुर्धर। छेदिलें सत्वर इंद्रास्त्रें॥३१॥ छेदिलें देखोनि इषीकास्त्र। कोपोनियां रावणपुत्र। सोडिता जाला याम्यास्त्र। रणीं सौमित्र लक्षोनी॥३२॥ येतां देखोनि याम्यास्त्र[7]। अस्त्रविंदानी सौमित्र। वाय्वस्त्रें तेंही अस्त्र। रणीं सत्वर छेदिलें॥३३॥ रणीं खवळोनि सौमित्र। पर्जन्यधारा वर्षे शर। पावोनि अतिकायशरीर। बाण समग्र भंगिले॥३४॥ ब्रह्मदत्त कवच त्यासीं। बाण न रुपती अतिकायासीं। तेणें लक्ष्मणें अति आवेशीं। बाणायुतेंसीं विंधिला॥३५॥ रणीं कोपोनि सौमित्र। अयुतायुत विंधिता शर। ब्रह्मकवचें अतिकाय वीर। व्यथा अणुमात्र पावेना॥३६॥

स वृष्यमाणो बाणौघैरतिकायो महाबलः। ब्रह्मदत्तवरो वीरो राक्षसेंद्रो न विव्यथे ॥२८॥
न शशाक रुजं कर्तुं यदा तस्य महाशरैः। अथैनमभ्युपागम्य वायुवाक्यमभाषत॥२९॥
ब्रह्मदत्तवरो ह्येष ह्यभेद्यकवचावृतः। ब्राह्मेणास्त्रेण भगवञ्जहि दैवतकंटकम्॥३०॥

वायूंच्या सूचनेप्रमाणे ब्रह्मास्त्रयोगाने अतिकायाचा वध : लक्ष्मणाचे दुर्धर शर। भेदूं न शकती निशाचर। ब्रह्मदत्तकवचें वीर। व्यथा अणुमात्र पावेना॥३७॥ ऐसे देखोनि लक्ष्मण। विचारीं पडला संपूर्ण। अतिकाया न भेदती बाण। काय आपण करावें॥३८॥ तंव गुप्तत्वें येऊनी। वायु गुज सांगे कानीं। यासी न भेदवे बाणीं। ब्रह्मवरदानी कवचावृत[1]॥३९॥ यासीं ब्रह्मयाचें

शब्दार्थ : १. घाबरला नाही, २. गंडस्थळांतून मदस्राव होत आहे असा, ३. व्यथा, ४. मिसळले, ५. बाण, ६. इषीका=दर्भ, तत्संबंधी अस्त्र ७. याम्य = यमसंबंधी.

वरदान। ब्रह्मास्त्रें विंधोनि बाण। सवेग याचा घ्यावा प्राण। दुष्ट दारुण देवद्रोही॥१४०॥ देवद्रोही[२] देवकंटक[३]। भूतद्रोही जीवघातक। धर्मद्रोही दुःखदायक। यासी आवश्यक मारावें॥४१॥ ऐकोनि वायूचें वचन। रणीं हर्षला लक्ष्मण। अतिकायाचा घ्यावया प्राण। ब्रह्मास्त्र पूर्ण सज्जिलें॥४२॥ अचुकसंधानी सौमित्र। हेमपत्री सित[४] पीत शर। बाणीं सज्जिलें ब्रह्मास्त्र। निशाचर मारावया॥४३॥ अस्त्रतेजाचा लखलखाट। बाणबळाचा कडकडाट। शरपिसारियाचा सुसाट। भंवत आट[५] सुरासरां॥४४॥ दैत्य दानव सुरगण। चंद्रसूर्यादि ग्रहगण। सुटतां लक्ष्मणाचा बाण। आंदोलायमान राक्षस॥४५॥ क्षोभें उलथत सागर। कंपें कांपती धराधर[६]। बाण सोडितां सौमित्र। चराचर हडबडिलें[७]॥४६॥ ऐसा येतां देखोनि बाण। स्वयें अतिकाय आपण। दृढ साधूनि रणांगण। धनुष्या गुण[८] वाहिला॥४७॥ अतिकाय महावीर। लघुलाघवें विंधी शर। ते बाण छेदूनि समग्र। ब्रह्मास्त्र लोटलें॥४८॥ येतां देखोनि ब्रह्मास्त्रासी। अतिकाय विंधि बहु बाणांसी। त्या छेदूनि सर्वांसी। आले अंगासी ब्रह्मास्त्र॥४९॥ जेंवी गरुड छेदी अजगर। तेंवी ब्रह्मास्त्रें छेदोनि शर। अतिकायाचें छेदावया शिर। आलें ब्रह्मास्त्र अंगासी॥१५०॥ सरलें हाणितां शस्त्रास्त्र। मग हाणी पर्वतशिखर। तरी न धरवे ब्रह्मास्त्र। हाहाकार ऊठिला॥५१॥ निर्वाणींचे विंधितां बाण। तेही ब्रह्मास्त्रें करोनि चूर्ण। अतिकायाचा घ्यावया प्राण। आलें जाण अंगासी॥५२॥ शक्ति शूळ गदा तोमर। फरश पट्टिश खड्ग कुठार। हाणिताही परिघ मुद्गर। ब्रह्मास्त्र ढळेना॥५३॥ समस्तही शस्त्रजाळ। ब्रह्मास्त्रें करोनि निष्फळ। अतिकायाचें कंठनाळ। रणीं तत्काळ छेदिलें॥५४॥ मुकुट कुंडलें सुशोभित। निजतेजें लखलखित। शिर छेदोनि रणांत। देदीप्यमान पाडित भूमीसीं॥५५॥

तच्छिरः सशिरस्त्राणं लक्ष्मणेन प्रमर्दितम्। पपात सहसा भूमौ शृंगं हिमतो यथा॥३१॥
तं भूमौ पतितं दृष्ट्वा विक्षिप्तं वीरभूषणम्। बभूवुर्व्यथि सर्वे हतशेषा निशाचराः॥३२॥

अतिकायराक्षस महापराक्रमी व अतिरथी होता : कुंभकर्णाची परम ख्याती। त्यातें महारथी म्हणती। अतिकाय तो अतिरथी। पाडिला क्षिती सौमित्रें॥५६॥ धन्य बळियाढा लक्ष्मण। मुकुट कुंडलें सशिरस्त्राण। शिर पाडिलें छेदून। विराजमान भूतळीं॥५७॥ जैसें हिमाद्रीचें शिखर। तैसें छेदोनि पाडिलें शिर। तें देखानि निशाचर। पळती सत्वर लंकेसीं॥५८॥ मारितां उरली राक्षससेना। पळोनि जावोनि लंकाभुवना। वृत्तांत सांगती दशानना। जे साही जणां मारिलें॥५९॥ देवांतक नरांतक त्रिशिरा। महापार्श्व महोदरा। मारिलें अतिकाया दुर्धरा। सहाही महावीरां प्राणांत॥१६०॥ रणीं लक्ष्मणाच्या हातीं। अतिकाय पावला ब्रह्मप्राप्ती। श्रीरामदृष्टीं युद्धस्थिती। परम मुक्ति राक्षसां॥६१॥ एका जनार्दना शरण। कुमार मारिले साही जण। पुढील कथेचें अनुसंधान। सावधान अवधारा॥६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अतिकायवधो नाम एकत्रिंशत्तमोऽध्यायः॥३१॥ ओव्या॥१६२॥ श्लोक॥३२॥ एवं॥१९४॥

## अध्याय बत्तिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### श्रीराम-लक्ष्मणांना शरबंधन

अतिकाय वधामुळे वानरसैन्यांत हर्षकल्लोळ व रावणाचा शोक : अतिकाय तो अतिरथी। सौमित्र केवळ पदाती। तेणें त्यासी पाडिले क्षितीं। वानर गर्जती हरिनामें॥१॥

शब्दार्थ : १. कवचाने आच्छादित, २. देवांचा द्रोह करणारा, ३. देवांचा वैरी, ४. शुभ, ५. त्रास, ६. पर्वत, ७. गडबडले, ८. दोरी.

प्रहर्षयुक्ता बहवश्च वानराः प्रबुद्धपद्मप्रतिमाननास्तदा।

अपूजयल्लक्ष्मणमिष्टभागिनं हते रिपौ भीमवले दुरासदे॥१॥

जैसीं उत्फुल्लित[1] पद्मकमळें। तैसीं वानरांचीं मुखकमळें। स्वानंदें शोभती प्रांजळें[2]। अतिकाय बळें मारलिया॥२॥ अतिकाय तो अतिरथी। लक्ष्मणें मारिला पदाती[3]। तें देखोनि श्रीरघुपती। सौमित्रा पूजित स्वानंदें॥३॥ स्वर्गीं गर्जतीं सुरवर। नामें गर्जती वानर। ऋषी करिती जयजयकार। विजयी सौमित्र संग्रामीं॥४॥ रणीं मारितां राक्षसभार। शेष उरले निशाचर। भेणें[4] ठाकून लंकापुर। सांगती सत्वर लंकेशा॥५॥ रडत पडत कुंथत। घायीं आले जर्जरित। येवानियां सभेआंत। वृत्तांत सांगत लंकेशा॥६॥ मागिल्या वीरांच्या कथा। त्वां ऐकिल्या लंकानाथा। अतिकाय मारिला आतां। आम्हांदेखता सौमित्रें॥७॥ अतिकाय मारिला सौमित्रें। हें ऐकोनि लंकेश्वरें। अति दुःखी दुःखभारें। काय उत्तर बोलत॥८॥ मागिलें दुःख आठवून। स्वयें अनुवादे रावण। समस्त वीर रणप्रवीण। मारिले स्वजन संग्रामीं॥९॥ धूम्राक्ष वज्रदंष्ट्र। अकंपन प्रहस्त धुर[5]। कुंभकर्ण सहोदर। महोदर महापार्श्व॥१०॥ माझिया कुमरां महावीरां। ज्यांचा धाक सुरासुरां। जे नाटोपती इंद्रादि अमरां[6]। त्या महाशूरां मारिलें॥११॥ देवांतक आणि त्रिशिरा। मारिलें नरांतक वीरा। आक्रंदत रुदनद्वारा। दशशिरा अति दुःख॥१२॥ भरंवशाचा कुंभकर्ण। कुमर मारिले प्रधान। आतां त्या रामासीं रण। करील कोण संग्रामीं॥१३॥ सुग्रीवें मेळविलें दळ। श्रीरामें आश्वासिलें सकळ। वानरीं करोनि रणकल्लोळ। धुराचि प्रबळ मारिल्या॥१४॥ आमच्या वर्मीचे आघात। सांगावया बिभीषण तेथ। तेणें मांडिला कुळक्षयार्थ। अतिकायघात तेणें केला॥१५॥ ब्रह्मास्त्रें अतिकाया मरण। हें वर्म सांगे बिभीषण। तेणें संग्रामी लक्ष्मण। झाला संपूर्ण निजविजयी॥१६॥ श्रीराम आणि लक्ष्मण। अंगद सुग्रीव हनुमान जाण। यांसी कोण करील रण। रडे रावण आक्रोशें॥१७॥

**इंद्रजिताचे रावणाला आश्वासन :** ऐकोनि रावणाचे रुदन। इंद्रजित आला धांवोन। आपला पुरुषार्थ आपण। बोले गर्जोन तें ऐका॥१८॥ इंद्रजित जीत[7] असतां। तुज दुःख कोण लंकानाथा। रामलक्ष्मणांच्या करीन घाता। आणि समस्तां वानरां॥१९॥ तूं राजा सर्वार्थीं प्रबळ। दुःखशोकाचा नव्हे काळ। आजि माझें पाहें बळ। रणकल्लोळ संग्रामीं॥२०॥ सुटल्या माझे निर्वाणबाण। सर्वांग बाणीं खिळोन। मारीन रामलक्ष्मण। प्रतिज्ञा प्रमाण हे माझी॥२१॥ वानरें कायसीं बापुडीं। बाणीं विंधोनि निर्वडीं[8]। पाडीन कपींचिया कोडी। रणधांदडीं[9] संग्रामीं॥२२॥ ऐसी बोलोनि आंगवण। घेवोनियां आज्ञापन। करून रावणासीं नमन। रथारोहण तेणें केलें॥२३॥

**इंद्रजिताचे रथामधून प्रयाण :** रथीं जुंपोनि महाखर। वरी बैसला निशाचर। ध्वज पताका छत्र चामर। शस्त्रसंभार संयोगें॥२४॥ वायुवेगें अत्यद्भुत। सबळ संजोगोनि रथ। इंद्रजित बैसोनियां तेथ। निघाला गर्जत संग्रामा॥२५॥ जे रथीं बैसला देख। समाधिसुखाहून अधिक। संग्रामीं जयाचे वाढे सुख। तेणें संमुख युद्धा आला॥२६॥ युद्धा निघतां इंद्रजित। सैन्य निघालें अत्यद्भुत। रथस्थ गजस्थ अश्वस्थ। निघाले समस्त गडगर्जें॥२७॥ फरश पट्टिश तोमर। शूळ त्रिशूळ मुद्गर। अचुकसंधान धनुर्धर। सैन्यसंभार चालला॥२८॥ जेंवी तमाबाहेर भास्कर। स्वयें निघे तेजाकार। तेंवी इंद्रजित महावीर। निघे सत्वर लंकेआंतोनी॥२९॥ शंख भेरी निशाण। वाजंत्रांचा नाद गहन। इंद्रजित निजतेंजें विराजमान। अपरभान[10] रणरंगीं

---

**शब्दार्थ :** १. फुलली, २. निर्मळ, सुंदर, ३. पायीं चालणारा अशा, ४. भयाने, ५. मुख्य सेनापति, ६. देवांना, ७. जिवंत, ८. संपूर्ण, ९.रणकल्लोळाने, १०. प्रतिसूर्य.

॥३०॥ सूर्यतेज फांके गगनीं। ह्याचें तेज संग्रामस्थानीं। इंद्र आणिला बांधोनी। रणांगणी जिणोनियां॥३१॥

रावणाचा इंद्रजिताला आदेश : सन्नद्ध सेनासंभार। युद्धा निघतां रावणकुमर। संतोषोनि दशशिर। काय उत्तर बोलत॥३२॥ रणीं जिणोनि इंद्रासी। बांधोनि आणिलें मजपासीं। तैसेंचि रामलक्ष्मणांसी। आणीं मजपासीं बांधोनी॥३३॥ रणीं न बांधवे रघुपती। दोघे मारावे रणव्युत्पत्तीं। तूं तंव योद्धा महारथी। करावी ख्याती संग्रामी॥३४॥ ऐकोनि पित्याचें वचन। करोनि प्रदक्षिणा नमन। इंद्रजित निघे आपण। घेवोनि सैन्यसंभारा॥३५॥ दोघे निधडे राम सौमित्र। भेणें कांपे इंद्रजितवीर। त्यांसीं करावया अभिचार[1]। गेला सत्वर निकुंबे॥३६॥ निकुंबळा अटकगिरी। तेथें अभिचारसामग्री। इंद्रजित दुष्ट दुराचारी। करवी ती परी अवधारा॥३७॥ इंद्रजित नव्हे निधडा वीर। कपटें करोनि अभिचार। रणीं जिंतिलें सुरासुर। तैसा रघुवीर न जिंकवे॥३८॥

स्थापयामास रक्षांसि रथं प्रति समंतत। सर्वतोऽग्निं समास्तीर्य शस्त्रपात्रैः सतोमरै :॥२॥
जुहाव रक्तं कृष्णस्य कंठाच्छागरय जीवतः। सकृदेव समिद्धस्य विधूम्रस्य महार्चिषः॥३॥
ततस्तं हुतभोक्तारं हुतभुक्सदृशप्रभः। जुहुवे राक्षसश्रेष्ठो विधिवन्मंत्रसत्तमैः॥४॥
जहविर्लाजसत्कारैर्माल्यगंधसुसंयुतैः। जुहुवे पावकं तत्र राक्षसेंद्र : प्रतापवान्॥५॥

निकुंबिळेत इंद्रजिताचा अभिचार प्रयोग : करावया अभिचारासी। इंद्रजित आला निकुंबळेसीं। तरी धाकत मानसीं। कळल्या रामासी येईल धाडीं॥३९॥ यालागीं निकुंबळेपासीं। द्वारद्वार मार्गमार्गासीं। राखण ठेविले राक्षसांसी। ससैन्यासीं सावध॥४०॥ श्रीरामाच्या कर्णपुटीं। बिभीषण हे सांगतां गोष्टी। वानरधाड येईल लाठी[2]। हेंही पोटीं धाकत॥४१॥ वारयासी न फुटे वाट। ऐसीं राखणें ठेवोनि स्पष्ट। आपण सेविलें यज्ञवाट[3]। हव्यवाटप्रतिष्ठा[4]॥ ४२॥ नागबाण शिववरदोक्त। मागां बांधिले राजसुत। ते तैंच जाले भस्मांत। श्रीरघुनाथप्रतापें॥४३॥ श्रीरामीं मिनली शस्त्रदेवता। ते परतोन न येचि हाता। इंद्रजित होय कुसुमुसिता। गेले वृथा नागपाश॥४४॥ वृथा गेले नागबंधन। आतां उरले ब्रह्मवरदान। त्या ब्रह्मपाशाचें बंधन। सावधान अवधारा॥४५॥ ब्रह्मवरदान इंद्रजितासी। होम करितां अभिचारासीं। होमदेवता तत्काळेंसीं। होईल तुम्हांसी सुप्रसन्न॥४६॥ मागां शरबंध - परिपाटीं। बंदी घातल्या देवकोटी। ते न चले श्रीरामीं गोष्टी। सावधानदृष्टी शरबंधी॥४७॥ श्रीरामीं न चले अभिचारिक। येतां देखे शरबंधासंमुख। इंद्रजित हो दशमुख। छेदील मस्तक राक्षसाचें॥४८॥ यालागीं शरबंधासमोर। येतांचि निशाचर। श्रीराम त्याचें छेदील वक्त्र। अतर्क्य शर वर्षोनी॥४९॥ शस्त्रदेवतेसी देवोनि मान। शरबंधीं पडिले आपण। त्यांसी न लागे शरबंधन। नित्यसावधान श्रीराम॥५०॥ हे ब्रह्मयाची ब्रह्मवरदोक्ती। पूर्वीच सांगितली होती। तोचि अभिचारस्थिती। आरंभी पुढती इंद्रजित॥५१॥ रिघोनियां यज्ञवाटा। प्रतिष्ठोनि हव्यवाटा[5]। होमसामग्रीची निष्ठा। निंद्य पापिष्ठा ते ऐका॥५२॥ द्विजकपाळींची जाण। प्रणितापात्रें संपूर्ण। असितोमरादि धनुष्यबाण। परिस्तरण[6] शस्त्रांचें॥५३॥ मद्याचें परिसमूहन[7]। मातंगमज्जाआघारण[8]। अशुद्धाचा[9] होम जाण। तोही सावधान अवधारा॥५४॥ निखळकृष्णच्छाग[10] खरा। तोही जीवंत असतां पुरा। त्याचे कंठी देवोनि सुरा। धरिलें रुधिरा नरशिरीं॥५५॥ स्त्रुकूस्त्रुवापात्रविचार। घडविलेसे अश्मसार[11]। तेणें स्त्रुवेनें निशाचार।

शब्दार्थ : १. जारणमारण, २. मोठी, ३. यज्ञस्थान, ४. अग्निप्रतिष्ठा, ५. अग्नीला, ६. सभोवार पसरणे, ७. सभोवती मार्जन करणे, ८. आघारण=वर टाकणे, ९. रक्ताचा १०. अत्यंत काळा बोकड, ११. दगडी.

होमी रुधिर हुताशीं[१] ॥५६॥ अस्त्रदेवता आव्हानून। मंत्रतंत्रक्रियाविधान। सर्व साधून सावधान। करी हवन इंद्रजित॥५७॥ मातंगीचे आणून दर्शन[२]। त्यांच्या लाह्या केल्या भाजून। गोरोचनाचें गंधविधान। सुमनें[३] संपूर्ण करवीर[४]॥५८॥ सर्षपभल्लातकमद्येंसीं। काळीचिडी दिवाभीतांसी। जीतचि खिळणीं[५] करोनि त्यांसी। होमिजे राक्षसीं आभिचारिक॥५९॥

इंद्रजिताला होम- समाप्तिनंतर ब्रह्मवरदानाची अदृश्य रथप्राप्ती : होम करितां प्रधान। यज्ञभोक्ता जो हुताशन। संतोषोनि आपण। ब्रह्मवरदान देता जाला॥६०॥

सोऽस्त्रमाहारयामास ब्राह्ममस्त्रविदां वरः। धनुः शरान्रथं चैव सर्वं तत्राभ्यमंत्रयत्॥६॥

तस्मिन्नाहूयमानेऽस्त्रे हूयमाने च पावके। सार्कं ग्रहेंदुनक्षत्रं वितत्रास नभ स्थलम्॥७॥

स पावकं पावकदीप्ततेजा। हुत्वा महेंद्रप्रतिमप्रभावः।

स चापबाणासिरथाश्वशूलः। खेंऽतर्दधेऽत्मानमचिंत्यरूपः॥८॥

ब्रह्मवरदाचें वरदान। करितां ब्रह्मास्त्रआवाहन। स्वयें शस्त्रदेवता येऊन। सुप्रसन्न होसरली[६]॥६१॥ त्याचेनि मंत्रोदकें जाण। रथखड्गादि धनुष्यबाण। अवघीं अभिमंत्री आपण। इंद्रजित जाण मंत्रोक्त॥६२॥ होम करितां प्रधान। मंत्रोदकें अभिषिंचन। रथाश्व सारथि चाप बाण। अंतर्धान पावलीं॥६३॥ देवता अंतर्धानगती। इंद्रजित हरिखला[७] चित्तीं। सांडून सैन्यभारसंपत्ती। बैसला रथीं साटोपें॥६४॥ अंतर्धानाचें लक्षण। रथाश्व सारथि चापबाण। स्वयें इंद्रजित आपण। कोणासीं जाण न दिसती॥६५॥

इंद्रजिताला वरदान मिळाल्यानें देवादिकांना चिंता : ऐसिये अदृश्यगतीं। देखोनि इंद्र चंद्र बृहस्पती। सूर्य वरुण ग्रहपंक्ती। धरा[८] कांपती सपर्वत॥६६॥ इंद्रजिताची अदृश्य गती। कैसेनि वांचे रघुपती। स्वर्गीं सुरवर गजबजिती। ऋषी धाकती ससिद्ध[९]॥६७॥

इंद्रजिताचे अदृश्यगतीने आक्रमण : ऐसिये अदृश्यगतीं। इंद्रजित बैसोनियां रथीं। धनुष्य वाहोनियां हातीं। वानरांप्रती शर वर्षे॥६८॥

ततः सरक्षोऽधिपतिर्महात्मा। सर्वा दिशो बाणगणैः शिताग्रैः।

प्रच्छादयामास रविप्रकाशैर्विद्रावयामास च वानरेंद्रान्॥९॥

सशूलनिस्त्रिंशपरश्वधानि। दीप्तानलार्कद्युतिसन्निभानि।

सविस्फुलिंगोज्वलपावकानि। ववर्ष तस्मिन्प्लवगेंद्रसैन्ये॥१०॥

अदृश्यगतीं निशाचर। बाण वर्षे शरधार। आच्छादोनि रवि चंद्र। दिशा समग्र बाणाकुळित[१०]॥६९॥ बाण येतां न दिसती। अवचितें अंगीं आदळती। तेणें वानरां खडतरती। रणीं पडती आक्रंदें॥७०॥ वानरांची जाति व्यक्ती। रणीं खिळले शरसंपाती। अदृश्य गतीची व्युत्पत्ती। वानरां ख्याती लाविली॥७१॥ संमुख योद्धा न दिसे जाण। कोणासी हाणूं द्रुमपाषाण। कोणासीं करूं आंगवण। म्हणतांचि बाण खडतरती॥७२॥ ऐसें वर्षोनि शरजाळ। वानरांचें प्रबळ दळ[११]। रणीं खिळोनियां ते सकळ। पाडिलें विकळ रणभूमीं॥७३॥ अदृश्यगति शस्त्रसंभार। परशु पट्टिश गदा मुद्गर। शूळ परिघ तोमर। रणीं वानर खोंचले॥७४॥ अदृश्य विंधी वानरवीरां। लाविला मेघनादें[१२] दरारा। विंधिल्या मुख्य धुरा। त्याही अवधारा सांगेन॥७५॥ अदृश्य विंधी इंद्रजित। खवळोनि अत्यद्भुत। मुख्य धुरांचा करित घात। अकस्मात अतर्क्य॥७६॥ अदृश्य रथाश्वसारथी। अदृश्य इंद्रजित महारथी। बाण येतां न दिसती। अंगी वाजती अतर्क्य॥७७॥ सुग्रीव राजा हनुमंत। अंगद नळ नीळ जांबवंत। रणी

शब्दार्थ : १. अग्नीला, २. दांत, ३. फुले, ४. पांढऱ्या कण्हेरीची, ५. शक्तिहीन, ६. प्राप्त झाली, ७. आनंद पावला, ८. पृथ्वी, ९. सिद्ध= एक देवजाती, १०. बाणांनी व्याप्त, ११. सैन्य, १२. इंद्रजिताने.

पाडिले मूर्च्छित। अतर्क्य घात महावीरां॥७८॥ येतां न दिसती बाण। जरी करावें निवारण। योद्धा संमुख न दिसे जाण। आंगवण करावया॥७९॥ मैंद द्विविद गंधमादन। केसरी दधिमुख सुषेण। कुमुद कुमुदाक्ष जाण। मूर्च्छापन्न पाडिले॥८०॥ गज गवय गवाक्ष। हरिलोमा पावकाक्ष। विद्युज्जिव्ह उल्कामुख। पाडिले असंख्य मूर्च्छित ॥८१॥ असंग वेगवंत पनस। धूम्र शतबली ज्योतिर्मुख। सूर्यानळ आणि सुमुख। बाणीं असंख्य पाडिले॥८२॥ करावया इंद्रजितसंहार। तार तरळ हरि वानर। गगना उसळले सत्वर। रावणकुमर वधावया॥८३॥ अतर्क्य बाणांचा आघात। शर भेदले हृदयांत। तेंही घायीं विव्हळत। मूर्च्छान्वित पाडिले॥८४॥ अतर्क्य शरांचा महामार। आणिकही वानरवीर। पाडून शरबंधी समग्र। हर्षे निर्भर इंद्रजित॥८५॥ शरबंधी वानरमात्र। रणीं पाडिले समग्र। आतां वधावया रामसौमित्र। निशाचर खवळला॥८६॥ संमुख देखतां रघुनाथ। निमिषार्धे[1] करील घात। अतर्क्य ब्रह्मवरदांत[2]। भोगी पुरुषार्थ इंद्रजित॥८७॥

इंद्रजिताचे श्रीरामांवर शरसंधान : ब्रह्मवरदाचें ब्रह्मास्त्र। होमीं साधून अभिचार[3]। तेणें बळें इंद्रजितवीर। रणीं वानर पाडिले॥८८॥ होमीं तोषवोनि हुताशन[4]। लावोनियां वरद बाण। घेवोनि ब्रह्मास्त्राचें वरदान। वानरसैन्य पाडिलें॥८९॥ सौमित्रा सांगे रघुनंदन। पूर्विलाऐसे शरबंधन। कराया इंद्रजित आपण। वरदबाण वर्षत॥९०॥ वानर माझेनि वीर्यवंत। माझेनि धैर्ये धैर्यवंत। माझेनि प्रतापें प्रतापवंत। ब्रह्मवरदें समस्त पडले॥९१॥ वरदबाण अति गुप्त। अंगी लागती अकस्मात। तेणें घायें कपि समस्त। रणीं हुंबत पाडिले॥९२॥ अतर्क्य ब्रह्मवरदविंदान। न दिसे योद्धा न दिसती बाण। अदृश्य शस्त्रीं वानरगण। शरबंधनी जाण बांधिले॥९३॥

श्रीरामांच्या सूचनेप्रमाणे इंद्रजिताच्या बाणांचे निवारणार्थ धरणीवर पडणे : मंत्र अस्त्र ब्रह्मास्त्रदेवो। मिळोनि तिहींचा समुदावो। कपि शरबंधी बांधिले पहाहो। सांगे रघुरावो सौमित्रा॥९४॥ ब्रह्मवरदबाणधारा। शरबंधीं बांधल्या वानरा। मुख्य उरल्या दोन धुरा। बांधावया शरां वर्षत॥९५॥ आम्हां उभे असतां दोन्ही। इंद्रजित विंधील विकट बाणी। ते निवरावया धरणीं। शरबंधनी पहुडावें॥९६॥ मागां साहिलें शिववरदान। तैसेंच सहावें ब्रह्मवरदान। मिथ्या करितां ब्रह्मवचन। दोष दारुण सौमित्रा॥९७॥ मिथ्या करितां नये ब्रह्मवचन। दोष ब्रह्महत्येसमान। यालागीं ब्रह्मवरदान। स्वयें आपण पाळावें॥९८॥ अवमानितां ब्राह्मणासी। क्षोभ उपजेल भगवंतासीं। मिथ्या करितां ब्रह्मवरदासी। परम दोषी होइजें॥९९॥ समूळ मूळींचें लक्षण। आम्हां दोघांसी नाहीं मरण। साहतां ब्रह्मशरबंधन। संदेह[5] कोण सौमित्रा॥१००॥ ऐकतां श्रीरामाचें वचन। शरबंधी पहुडे लक्ष्मण। त्याचि सवे रघुनंदन। शरबंधी जाण पहुडला॥१॥

रामलक्ष्मण शरबंधनात पडलेले पाहून इंद्रजिताचे लंकेत आगमन : सव्यहस्तें[6] धनुष्यबाण। दोघे देखोनि विसंज्ञ[7]। इंद्रजित हरिखला संपूर्ण। भेरी निशाण त्राहाटिलें॥२॥ करोनियां वाजंत्राचा गजर। पुढें नाचती निशाचर। रणीं जिंतिले रामसौमित्र। सांगे समग्र लंकेशा॥३॥

संस्तूयमानः स तु यातुधानै पित्रे च सर्वं हृषितोऽभ्युवाच।
तयोस्तदासादितयो रणाग्रे मुमोह सैन्यं हरियूथपानाम्॥११॥
सरामसौमित्रिमथाप्रमेयं विव्याध सर्वं सहसा रणाग्रे।
सर्वे विषण्णा विगतप्रभाश्च न चापि किंचित्प्रतिपेदिरे स्म॥१२॥

---

शब्दार्थ : १. निमिष= डोळ्याची पापणी लवण्याचा काळ, २. ब्रह्मदेवाच्या वराने, ३. जारणमारणक्रिया, ४. अग्नी, ५. संशय, ६. डाव्या हाताने, ७. मूर्च्छित, निश्चेष्ट.

शरबंधेंसीं बांधोनी वैरी। इंद्रजित प्रवेशतां नगरीं। भाट गर्जती कैंवारीं। निशाचरीं स्तुतिवाद॥४॥ शरबंधी रामसौमित्र। बांधिले वानर समग्र। इंद्रजित हर्षे निर्भर। सांगे सत्वर लंकेशा॥५॥ शरबंधी बांधितां जाण। वीर्यधैर्यशौर्यक्षीण। मुख्य करोनी रामलक्ष्मण। आंगवण न करवे॥६॥ शरबंधाचें लक्षण। लागतांचि सूर्यकिरण। अवघियांचें जातील प्राण। कोणासी कोण सोडवील॥७॥ श्रीरामकटकीं शरपंजर। शरबंधी बांधले वानर। इंद्रजित विजयी महावीर। वर्षे निर्भर लंकेश॥८॥ एका जनार्दना शरण। मिथ्या शरबंधी रामलक्ष्मण। स्वयें पडोनि आपण। ब्रह्मवरदान प्रतिपाळिती॥१०९॥ स्वति श्रीभावार्थ-रामायणे युद्धकांडे। एकाकारटीकायां रामलक्ष्मणशरबंधनं नाम द्वात्रिंशत्तमोऽध्यायः॥३२॥ ओंव्या॥१०९॥ श्लोक॥१२॥ एवं॥१२१॥

## अध्याय तेहतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### रामलक्ष्मणांची शरबंधनांतून सुटका

ब्रह्मवरदानाच्या पालनाकरिता रामलक्ष्मण शरबंधनात पडले : प्रतिपाळावया ब्रह्मवरदान। श्रीराम आणि लक्ष्मण। शरबंधी पडोनि आपण। विसंज्ञपण दाविती॥१॥ बहुरूपी प्रेताचें सोंग धरी। आपण सावध अंतरीं। रामसौमित्र तयापरी। शरपंजरी सावध॥२॥ शरबंधी बांधले दोघे जण। विकळ दिसती रामलक्ष्मण। परी ते सबाह्य सावधान। प्रतापे पूर्ण पुरुषार्थी॥३॥ ब्रह्मयाचे वरदें देख। येतां शरबंधासंमुख। इंद्रजित अथवा दशमुख। छेदील मस्तक श्रीराम॥४॥ यालागीं शरबंधासमोर। कोणी न येती निशाचर। करित विजयाचा गजर। गेले समग्र लंकेसीं॥५॥ लागतां शरबंधाचे बाण। वानरांचा जावा प्राण। करितां रामनामस्मरण। अवघे जण वांचले॥६॥ शरबंधी रामलक्ष्मण। शरबंधीं वानरगण। तें देखोनि बिभीषण। आला आपण साक्षेपें[१]॥७॥

बिभीषण सुग्रीवापाशी जातो : शरबंधी वानरसैन्य। बाणी पाडिलें खिळोन। शरबंधी रामलक्ष्मण। दोघे विसंज्ञ[२] महावीर॥८॥ ऐसें देखोनि शरबंधन। स्वयें आला बिभीषण। बाणीं खिळिलें वानरगण। सावधान नाहीं कोणी॥९॥ कपट बुद्धि राक्षसांधमा। रणीं बांधिलें रघूत्तमा। बिभीषण धार्मिक धर्मात्मा। शुद्ध सत्वात्मा सात्विक॥१०॥ वानरराजा सुग्रीव जाण। त्यापासीं येवोनि बिभीषण। त्यासी करी सावधान। युक्तवचन अनुवादे॥११॥ ब्रह्मशापाचें वरदान। स्वयें पाळी रघुनंदन। त्यासी बाधी शरबंधन। सावधान शरबंधीं॥१२॥ नाहीं भयाचा संकेत। विषाद[३] सांडावा समस्त। शरबंधी श्रीरघुनाथ। सावचित्त स्वानंदे॥१३॥ ब्रह्मदत्तवरदान। तें हें ब्रह्मास्त्र दारुण। ब्रह्मवरदा मिथ्यापण। रघुनंदन येऊं नेदी॥१४॥ हृदयीं साहोनियां लात। श्रीवत्सलांछन मिरवित। तो हा स्वयें श्रीरघुनाथ। मिथ्या वरदार्थ होऊं नेदी॥१५॥ ऐसिया वरदानपरी। वानरवीरांचिया हारी[४]। खिळोनि पाडिल्या शरपंजरीं। नाहीं त्यां तरी जीव भय॥१६॥ ब्रह्मास्त्रा देवोनि मान। शरबंधी रामलक्ष्मण। तैसाच हनुमंत आपण। तो देत सन्मान ब्रह्मास्त्रा॥१७॥ हनुमंता न बाधी शरबंधन। तोही ब्रह्मास्त्रा देतसे मान। ऐकोनि बिभीषणवचन। मारुति आपण बोलत॥१८॥

बिभीषणवचः श्रुत्वा हनुमानिदमब्रवीत्। अस्मिन्शस्त्रहते सैन्ये वानराणां मनस्विनाम्॥१॥

शब्दार्थ : १. अभत्याने, २. मूर्च्छित, ३. दुःख, खेद, ४. समुदाय, पंक्ती.

यो यो धारयति प्राणांस्तमाश्वासयावहे। तावुभौ युगपद्वीरौ वायुपुत्रबिभीषणौ ॥२॥
उल्काहस्तौ तदा रात्रौ रणशीर्षे विचेरतुः ॥३॥

बिभीषण हनुमंतासह वानरसैन्याची पाहणी करतो : ऐकोनि बिभीषणवाक्यासी। हांसू आलें हनुमंतासी। ब्रह्मास्त्र न बाधी आम्हांसी। हें तूं जाणसी कैसेनि ॥१९॥ अशोकवनीं ब्रह्मपाश। ब्रह्मयानें घालितां सावकाश। तवं तूंवश न होसी त्यास । मग ब्रह्मास्त्रास केंवी होसी ॥२०॥ ऐकोनि बिभीषणाचें वचन। हनुमान जाला सुखसंपन्न। पडलें देखोनि वानरसैन्य। काय आपण बोलत ॥२१॥ वानरवीर पडिले क्षितीं। कोणाची कैसी गती। दोघे चुडी घेऊनी हातीं। शोधूं निश्चितीं रणभूमी ॥२२॥ ऐसे बोलतांचि जाण। संतोषला बिभीषण। चुडी उजळोनि देदीप्यमान। दोघे जण निघाले ॥२३॥ वानरवीरांचिया श्रेणी। खिळोनि पाडिल्या शरबंधनी। अशुद्ध[1] वाहत धरणीं। होत चिडाणी[2] मेदमांसा ॥२४॥ वानरवीरांच्या वडवाळी[3]। खिळोनी पाडिल्या भूतळीं। मुख्य धुरा आतुर्बळी। त्याही शरजाळीं पाडिल्या ॥२५॥ सुग्रीव अंगदादि जुत्पती। जे पूर्वप्रसंगी लिहिले आहाती। तेचि वीरवानर क्षितीं। पडिलें मारुति स्वयें खेदे ॥२६॥ असंख्य वानर पडिले क्षितीं[4]। संख्या न करवें निश्चितीं। संख्या करूं शकला मारुती। तेही संख्योक्ती अवधारा ॥२७॥ पावत पावतां दीनांत। वानर पडिले रणाआंत। त्यांची संख्या हनुमंत। बिभीषण युक्त सांगत ॥२८॥ अस्त पावतां दिनकर[5]। सदुसष्ट कोटी वानर। रणीं पाडिले महाशूर। विंधोनि शर ब्रह्मास्त्रें ॥२९॥ न मे भक्तः प्रणश्यति। हे रामाची अगाध कीर्ती। वानर सर्वथा न मरती। केली युक्ती हनुमंतें ॥३०॥ वानर सदुसष्ट कोटी। पडिले देखोनि रणसंकटीं। हनुमंत कृपादृष्टीं। कानीं गोष्टी अनुवादे ॥३१॥ कानीं सांगतां श्रीरघुनाथ। वानर व्यथेसी निर्मुक्त। ब्रह्मवरदानें गोंविले तेथ। उठो न शकत निजबळें ॥३२॥ रामनामस्मरणेंकरीं। वानर सावध शरपंजरीं। तिळभरी व्यथा नाहीं शरीरीं। न सुटवे तरी शरबंधी ॥३३॥ धन्य ब्राह्मणाचें महिमान। उल्लंघीना रघुनंदन। स्वयें शरबंधी पहुडोन। ब्राह्मणवचन प्रतिपाळी ॥३४॥ ऐसी वरदानाची ख्याती। तेथें वानर ते किती। कैसेनि शरबंधी सुटती। बह्मवरदोक्तीं[6] बांधले ॥३५॥ बाप कृपाळू हनुमंत। कानीं जपोनि श्रीरघुनाथ। शरबंधी सावचित्त। केले समस्त वानर ॥३६॥ वानर शरबंधी समस्त। देखोनि बिभीषण हनुमंत। शोधावया जांबवंत। स्वयें निघत साक्षेपें ॥३७॥ अति वृद्ध जांबवंत। अतिशयेंसीं बुद्धिमंत। वानर व्हावया निर्मुक्त। उपायार्थ सांगेल ॥३८॥ अत्यंत जर्जरित जरा[7]। बाणीं खिळिलें शरीरा। देखोनि जांबवंतवीरा । आला पुढारां बिभीषण ॥३९॥ तयासी पुसे बिभीषण। सर्वांगी खडतरले बाण। तुझे वांचले कैसेनि प्राण। तें संपूर्ण मज सांग ॥४०॥ जांबवंत सांगे आपण। अंगी खडतरतां बाण। तेव्हांचि माझा जावा प्राण। वांचलों जाण रामस्मरणें ॥४१॥

बिभीषणवचः श्रुत्वा जांबवानृक्षपुंगवः। कृच्छ्रेण धारयन्प्राणानिदं वचनमब्रवीत् ॥४॥
नैऋतेंद्र महावीर्य स्वरेण त्वाभिलक्षये। विद्धगात्रः शितैर्बाणैर्न त्वां पश्यामि चक्षुषा ॥५॥
अंजना सुप्रजा येन मातरिश्वा च निर्वृतः। क्वचिद्धारयति प्राणान्हनूमान्प्लवगर्षभः ॥६॥

जांबवंत हनुमंताची चौकशी करितो : ऐकोनि बिभीषणाची मात। बाणीं खिळिला विव्हळित। अति प्रयासें जांबवंत। असे बोलत तें ऐका ॥४२॥ ओळखूनियां शब्दज्ञान। तुज मी जाणें बिभीषण। बाणधारा विकळ पूर्ण। डोळे उघडोन पाहवेना ॥४३॥ असो हे विकळतेची मात। अंजनीपुत्र अति विख्यात। तो स्वस्थ आहे की हनुमंत। त्याचा वृत्तांत मज

शब्दार्थ : १. रक्त, २. चिखल, ३. समुदाय, ४. पृथ्वीवर, ५. सूर्य, ६. ब्रह्मदेवाच्या वरदवाणीने, ७. म्हातारपणाने.

सांग ॥४४॥ धन्य हनुमंताचें भजन। धन्य हनुमंताचें आचरण। धन्य हनुमंताची आंगवण। लंकाकंदन जेणें केलें ॥४५॥ चौदा सहस्र बनकर। ऐशीं सहस्र किंकर। जंबुमाळी प्रधानपुत्र। अखयाकुमर मारिला ॥४६॥ ससैन्य गांजिला इंद्रजित। लंके गांजिला लंकानाथ। परम पराक्रमी हनुमंत। त्याचा वृत्तांत मज सांगा ॥४७॥ ऐसें बोलतां जांबवंत। बिभीषण अति विस्मित। सांडून श्रीरामाची मात। पुसे हनुमंत साक्षेपें ॥४८॥ तेंचि त्याचें मनोगत । समूळ शोधावया भावार्थ । बिभीषण असे पुसत। तोचि श्लोकार्थ अवधारा ॥४९॥ कोठें आहे हनुमंत। ऐसें पुसतां जांबवंत। त्याचा पहावया भावार्थ। वाक्य वदत बिभीषण ॥५०॥ बांधोनि सेतुबंधासी। ज्यांलागीं आलों लंकेसी। सांडून त्या रामलक्ष्मणांसी। हनुमान पुससी किमर्थ ॥५१॥ सुग्रीव राजा वानरनाथ। अंगद युवराज विख्यात। सांडून जुत्पतीवृत्तांत। कां पां हनुमंत पूससी ॥५२॥ सांडून ज्येष्ठ बंधु धूम्रासी। सांडून श्रेष्ठां वानरांसी। हनुमान साक्षेपें[१] पुससी। कोण अर्थासीं सांग पां ॥५३॥ सांडून श्रीरामाची भक्ती। नाहीं सुग्रीवआसक्ती। हनुमंती अति प्रीती। कोण अर्थी तें सांग ॥५४॥

बिभीषणवचः श्रुत्वा जांबवानिदमब्रवीत्। श्रृणु नैर्ऋत शार्दूल यन्मां पृच्छसि मारुतिम् ॥७॥
तस्मिन्जीवति वीरे हि हतमप्यहतं बलम्। हनूमति हते सर्वे जीवंतोऽपि हता वयम् ॥८॥
एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं प्रत्युवाच बिभीषणः। ध्रियते मारुतिस्तात मारुतप्रतिमो जवे ॥९॥
वैश्वानरसमं तेजो धारयन्प्लवगर्षभः। त्वामेव मार्गणायातो मयैवाद्य सह प्रभो ॥१०॥

बिभीषण जांबवंताला हनुमंताच्या चौकशीचे कारण विचारतो : कां पुसिला हनुमंत। ऐसें बिभीषण पुसत। त्यापुढें जांबवंत। प्रताप सांगत हनुमंताचा ॥५५॥ जीत[२] असतां हनुमंत। मेले वानर समस्त जीत। ऐसा मारुति प्रतापवंत। जीवन निश्चित कपिसैन्या ॥५६॥ जरी तो निमाला हनुमंत। तरी आम्ही मेलों जीव जीत। कोण करील सावचित्त। शरबंधी समस्त वानर ॥५७॥ लागतां सूर्योदयींचे किरण। शरबंधी वानरगण। आदी करोनि रामलक्ष्मण। अवघ्यांचे प्राण जातील ॥५८॥ जीत असलिया हनुमंत। आणोनि द्रोणाद्रि पर्वत। वानर वांचवील समस्त। यालागीं हनुमंत पूसिला ॥५९॥ जांबवंताचें गोड वचन। ऐकोनियां बिभीषण। संतोषोनियां आपण। हनुमंत लक्षण सांगत ॥६०॥ हनुमंत वज्रदेही आपण। याच्या अंगी न रुपती बाण। त्यासी बांधीना शरबंधन। सावधान साटोपें ॥६१॥ तो महावीर हनुमंत। मजसवें तुज गिवसित[३]। स्वयें आला असे येथ। जाण निश्चित ऋक्षराजा[४] ॥६२॥ प्रळयतेजें विराजमान। वायुबळेंसी समान। हनुमान आलासे आपण। तुझें दर्शन घ्यावया ॥६३॥ ऐसें बोलतां बिभीषण। हनुमंतें घातलें लोटांगण। जांबवंत करितां नमन। येरें[५] अलिंगन दीधलें ॥६४॥

ततोऽब्रवीन्महातेजा हनूमंतं स जांबवान्। आगच्छ हरिशार्दूल वानरांस्त्रातुमर्हसि ॥११॥
भवन्विक्रमसंपन्नस्त्वमेषां परमा गतिः। त्वत्पराक्रमलालोऽयं नान्य पश्यामि कंचन ॥१२॥
ऋक्षवानरवीराणामनीकानि प्रहर्षय। विशल्यौ कुरु चाप्येती भ्रातरौ रामलक्ष्मणौ ॥१३॥

जांबवंत हनुमंताला दिव्यौषधी आणण्यास पाठवितो : आलो जाणोनि हनुमंत। आम्ही वाचलों समस्त। पुनर्जन्म जाला प्राप्त। ऐसा हर्षित जांबवंत ॥६५॥ आलिंगोनि हनुमंतासी। जांबवंत बोले त्यासी। वांचवावया कपिसैन्यासी। दिसे तुजपासीं पराक्रम ॥६६॥ शरबंधी

शब्दार्थ : १. अगत्याने, २. जिवंत, ३. शोधीत, ४. ऋक्ष-अस्वल, त्यांचा राजा (जांबवत), ५. दुसऱ्याने-बिभीषणाने.

रामलक्ष्मण। त्यांची करावया सोडवण। तुझ्या अंगीं आंगवण। न दिसे आन तिहीं लोकीं ॥६७॥ वानरसैन्याची मांदी[1]। पडली आहे शरबंधी। ते तूं वांचवी त्रिशुद्धी[2]। दिव्यौषधी आणोनी ॥६८॥ शरबंधीं वानर सकळ। पडिले आहेत अति विकळ। आजि तुझा प्रतापकाळ। तूं प्रबळबळपुरुषार्थी ॥६९॥ तुझ्या बळाची अगाध थोरी। दिव्यौषधी आणोनि हारीं। उठवीं कपिसेना सभारीं। होईं उपकारी श्रीरामा ॥७०॥ आमच्या भाग्यास्तव जाण। शरबंधी तूं सावधान। वांचवावया वारनगण। आंगवण तुजपासीं ॥७१॥

औषधी प्राप्तीचे ठिकाण हनुमंताला जांबवंत सांगतो : कोठोनि आणूं औषधींसी। ऐसें काहीं पुसों पाहसी। त्याही सांगेन स्थळासी। अति वेगेंसी निघावें ॥७२॥ विलंब न साहे व्यवधान लागतांचि सूर्यकिरण। निमती श्रीरामलक्ष्मण। वानरगणसमवेत ॥७३॥ यालागीं नुगवतां गभस्ती[3]। शीघ्र जावोनि रातोरातीं। आणावें दिव्यौषधींप्रती। श्रीरघुपतिनिजसेवा ॥७४॥ ऐकोनि जांबवंतवचन। आलें हनुमंता स्फुरण। शीघ्र करावया उड्डाण। औषधिस्थान पूसत ॥७५॥ आदरें पुसतां हनुमंत। दिव्यौषधींचा पर्वत। हर्षें सांगे जांबवंत। तोचि श्लोकार्थ अवधारा ॥७६॥ ऐका दिव्यौषधींचें स्थान। सागरावरौतें जाण। लंघून महागगन। विजनवन टाकावें ॥७७॥ तेथें हिमाचल पर्वत। ठाकून जावें निणित। त्याच्या हेमशिखरांआंत। द्रोणाद्रि त्वरित पावसी ॥७८॥ ऐकें तो चतुष्कोण विस्तृत। दिव्यौषधीं लखलखित। तेजें दशदिशा दीप्तिमंत। तेज नभाआंत न समाये ॥७९॥

दिव्यौषधी वर्णन : ऐसा निजतेजें विराजमान। त्या औषधी कोण कोण। उपयोगी गुणलक्षण। विशद[4] व्याख्यान अवधारीं ॥८०॥ मेले वांचवी वायुस्पर्शनीं। तीस नांव अमृतसंजीवनी। हृदयींचें शल्य जाय विरोनी। विशल्यकरणी[5] ते दुजी ॥८१॥ घायीं तुटले दुधड वण। जिचेनि जाती पैं बुजोन। अंगी घाव न दिसे वण। सुवर्णाकरिणी ते जाण ॥८२॥ तुटलीं हडीं[6] छिन्नभिन्न। पूर्विलीऐसीं जाती सांधून। सर्वथा न दिसे तुटलेपण। संधिनी जाण ते चवथी ॥८३॥ चौऔषधींसमवेत। शीघ्रयावें रातोरात। वानर वाचवीं समस्त। श्रीरघुनाथ संतोषा ॥८४॥ ऐकतां जांबवंतवचन। आलें हनुमंता स्फुरण। जेंवी चंद्रोदयीं जाण। भरे संपूर्ण क्षीराब्धी ॥८५॥ जांबवंतवाक्यें जाण। औषधी आणावया आपण। हनुमंतें मांडिलें उड्डाण। तेंही लक्षण अवधारा ॥८६॥

हनुमंताची गर्जना व लंकेमध्ये घबराट : हनुमान अंगें आतुर्बळी। साटोपें देतां आरोळी। लंकेमाजी बैसली टाळी। दांतखिळी राक्षसां ॥८७॥ अंगें गर्जला हनुमंत। इंद्रजित धाके लंकानाथ। राक्षसांसीं अति आकांत। प्रळयावर्त लंकेसी ॥८८॥ रामकटकींचा वृत्तांत। पाहूं येतां राक्षस भीत। अवघे दडाले लंकेआंत। साशंकित कपिभयें ॥८९॥

हनुमंताचे उड्डाण व पर्वतावर आगमन : पायें दडपोनि लंकागिरी। वानर उडतां अंबरी। माड्या गोपुरें लंकापुरी। पडती सागरीं अंगवातें ॥९०॥ मुख आरक्त अति विक्राळ। थरकत सूर्यप्राय लांगूळ[7]। टंवकरोनि कर्णयुगळ[8]। कपि प्रबळ उडतसे ॥९१॥ खालावोनि[9] निजपृष्ठी। भ्रूभंगा देवोनि गांठी। पर्वत लक्षोनियां दृष्टीं। उठाउठीं उडाला ॥९२॥ पर्वत दडपतां तळीं। सर्प गजबजतीं पाताळीं। वृक्ष उपडती निराळीं[10]। जेंवी वाहुटळीं तृणपर्णें ॥९३॥ उचंबळलें समुद्रजळ। सरिता[11] उचंबळल्या तत्काळ। तेणें तिंबले ध्रुवमंडळ। कपीचें प्रबळ उड्डाण ॥९४॥ करोनि प्रदक्षिणा उड्डाण। इंद्रचंद्रादिग्रहस्थान। सूर्यवरुणादि यमसदन। उल्लंघून

---

शब्दार्थ : १. जमाव, समुदाय, २. सत्यपणाने, ३. सूर्य, ४. स्पष्ट, ५. जखम, ६. हाडे, ७. शेपूट ८.दोन्ही कान, ९. खाली करून, १०. आकाशात, ११. नद्या.

चालिला ।।९५।। शोधावया सूर्याची गती। पूर्वे उडाला मारुती। तेंवी देखोनियां अपार राती। उत्तरपंथी उडाला ।।९६।। जनोलोक तपोलोक। ओलांडोनि सत्यलोक। टाकिलें मेरुमस्तक। एकाएक हनुमंतें ।।९७।। सन्निध[1] कैलासाद्री। तेथें देखिला हेमाद्री। द्रोणाद्री तो त्यामाझारी। जयावरी दिव्यौषधि ।।९८।। दिव्यौषधि दीप्तिमंत। तेजें नभ[2] लखलखित। तें देखोनि हनुमंत। अति विस्मित स्वयें जाला ।।९९।।

कैलासमुग्रं हिमवच्छिलाश्च तं वै वृषं कांचनशैलमग्र्यम्।
प्रदीप्तसर्वौषधिसंप्रदीप्तं ददर्श सर्वोषधिपर्वतेंद्रम् ।।१४।।

कैलासानिकट हेमाद्री। द्रोणाद्रि तो त्यामाझारीं। दिव्यौषधि त्यावरी। निजतेजेंकरी लखलखित ।।१००।। वायु रुद्राचा निजदूत। मारुति त्याचा निजसुत। वेगें उडोनि हनुमंत। औषधी आणूं स्वयें आला ।।१।।

दिव्यौषधींची अदृश्यता पाहून हनुमंत रागाने पर्वतच उपटून आणतो : दिव्यौषधी पर्वतीं। कपि नेऊं आला निश्चितीं। तेणें त्या ठेल्या अदृश्यगती। वेढा मारुती लाविला ।।२।। पुढां औषधी। लखलखिती। तेथें सवेग जाय मारुती। घेवों जातां हातो हातीं। त्याही होती अदृश्य ।।३।। पुढां औषधी दिसती। हनुमान धांवे तयांप्रती। तंव त्या मागें आभासती। त्याही होती अदृश्य ।।४।। औषधी न लागतीच हातीं। तेणें क्षोभला मारुती। गर्जोनि कोपानुवृत्तीं। पर्वताप्रती बोलिला ।।५।। मी श्रीरामाचा निजदूत। शरबंधी पडला श्रीरघुनाथ। विशल्य[3] करावया निश्चित। औषधार्थ मी आलों ।।६।। तुवां औषधि केलिया गुप्त। आतां पाहूं तुझा पुरुषार्थ। पुच्छे कवळोनि पर्वत। औषधीं सहित उपडिला ।।७।। कपिशक्ति अति वाड[4]। पर्वत उपडितां कडाड। स्वर्गीं सुरावरां हडबड[5]। कांपती प्रौढ दिग्गज ।।८।। देखोनि कपीची आंगवण। सुरासुरांचा दचके प्राण। विद्याधर सिद्धचारण। कंपायमान धराधर[6] ।।९।। दिव्यौषधीं समवेत। उपडोनि तो पर्वत। सवेग हनुमान असे येत। जेंवी भास्वत[7] प्राचीसी[8] ।।११०।।

संस्तूयमानः सुरसिद्धसंघैर्जगाम वेगादतिचंडवेगः।
स तेन शैलेन भृशं रराज शैलोपमो गंधवहस्य सूनुः ।।१५।।
स तं गृहीत्वा निपपात तस्मिन् शैलोत्तमं वानरसैन्यमध्ये।
हर्युत्तमैस्तैरभिशस्यमानो बिभीषणेनापि च शस्यमानः ।।१६।।
ततस्तु तौ मानुषराजपुत्रौ तं गंधमाघाय महौषधीनाम्।
बभूवतूस्तत्र तदा विशल्यौ संरूढसर्वव्रणनष्टशोकौ ।।१७।।

उपडोनि द्रोणाद्रि पर्वत। घेवोनि जातां हनुमंत। सुर सिद्ध स्तुतिवाद करीत। श्रीरामभक्त कपिमुख्य ।।११।। स्वामी करावया सावधान। सगळा पर्वत उपडोन। घेऊन आला वायुनंदन। आंगवण अतुळित[9] ।।१२।। निवारावया स्वामिसंकट। पर्वत उपटिला उद्भट[10]। आंगवण अति श्रेष्ठ। वीर वरिष्ठ हनुमंत ।।१३।। विष्णुचक्र सवेग जात। त्याहून वेगें हनुमंत। औषधींसहित पर्वत। स्वामिकार्यार्थ आणिला ।।१४।। पर्वत घेवोनि हनुमंत। कैसिया शोभा शोभत। जैसा विष्णु चक्रयुक्त। तैसा दिसत महावीर ।।१५।।

औषधींच्या वासानेच वानर सैन्याला शुद्धी येते : पर्वत जया औषधी वरी। आणितांचि वानरभारीं। त्या वायुस्पर्शें वानरहारी। शरपंजरीं सूटल्या ।।१६।। रामलक्ष्मण दोघे बंधु। येतां दिव्यौषधिगंधु। विरोनि गेला शरबंधु। निर्मुक्त बोध पावले ।।१७।। वानरांअंगीं घाय दारुण। बुजोनि गेले पैं संपूर्ण। अंगीचें कानपले[11] वण। अस्थि संपूर्ण सांधिल्या ।।१८।।

शब्दार्थ : १. जवळ, २. आकाशात, ३. शल्य = जखम, तीपासून मुक्त, ४. फार विलक्षण, ५. भय, ६. शेष, ७. सूर्य, ८. पूर्वेला, ९. अतुल्य, १०. मोठा, ११. बरे झाले.

घाय बुजती हें नवल कोण। वानरांच्या अस्थि[१] शतचूर्ण। त्याही अस्थिबंधें सांधून। सावधान उठवील॥१९॥

श्रीराम हनुमंताचा सन्मान करितात : श्रीरामें सन्मानिला हनुमंत। सुग्रीव अंगद जांबवंत। बिभीषण सन्मानित। स्तुति वदत स्वानंदें॥२०॥ वानरसैन्या विश्रांती। देतां जाला स्वयें मारुती। अवघे जण अभिवंदिती। सन्मानिती स्तुतिवादें॥२१॥ शरबंधी सुटला रामचंद्र। वानर करिती जयजयकार। रामनामाचा गजर। नामें अंबर[२] कोंदलें॥२२॥ बाप बळियाढा[३] हनुमंत। उचलोनि औषधिपर्वत। जेथील तेथें ठेवोनि स्वस्थ। आला त्वरित स्वामीपासीं॥२३॥ एका जनार्दना शरण। झालें शरबंधमोचन। पुढील कथा गोड गहन। सावधान अवधारा॥१२४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां शरबंधमोचनं नाम त्रयस्त्रिंशत्तमोऽध्यायः॥३३॥ ओव्या॥१२४॥ श्लोक॥१७॥ एवं ॥ १४१॥

## अध्याय चौतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### कुंभाचा वध

श्रीरामसैन्य शरबंधनातून मुक्त झाले : स्वयें बिभीषण बोलत। हनुमान वीर अति विख्यात। शरबंधीं श्रीरघुनाथ । सैन्यासमवेत ऊठिला॥१॥ अंगद सुग्रीव राज्यधर। जुत्पतींसमवेत[४] वानर। येणें उठविले समग्र। वीर शूर स्वामिभक्त॥२॥ मारुतीस मानी श्रीराघव। मारुतीस मानी सत्य सुग्रीव। मारुतीस मानिती वीर सर्व। कीर्ति अभिनव[५] येणें केली॥३॥ निमिषें[६] आणोनि पर्वत। वानर उठवोनि समस्त। ठेवोनि आला जेथींचा तेथ। श्रीरामभक्त हनुमंत॥४॥

ततो ऽ ब्रवीन्महातेजा सुग्रीवो वानराधिपः। अर्थ्यं विज्ञापयन्नेवं हनूमन्तमिदं वचः॥१॥
येतो हतः कुंभकर्णः कुमाराश्च निषूदिताः। नेदानीमुपनिर्हारं रावणः कर्तुमर्हति॥२॥
लंकामभिपतंत्वाशु प्रगृह्योल्काः प्लवंगमाः। ततोस्तंगत आदित्ये रौद्रे तस्मिन्निशामुखे॥३॥
लंकामभिमुखा जग्मुः सोल्कास्ते हरियूथपाः॥४॥

सुग्रीवाचे हनुमंताला धन्यवाद : देखोनि हनुमंताची ख्याती। सुग्रीव सुखावोनि चित्तीं। काय बोले वीरांप्रती। धन्य मारुति प्रतापी॥५॥ ऐकें बापा पवनपुत्रा। ज्याचा भरंवसा दशशिरा। त्या मारिलें रावणकुमरा। परिवारासंगम॥६॥ देवांतक नरांतक वीरा। मारिला अतिकाय त्रिशिरा। यापरी त्या रावणकुमरां। रणीं समग्रां निर्दळिले॥७॥

रावण कपट करील म्हणून लंका जाळून टाकण्याचा सुग्रीवाचा सल्ला : येणें दुःखें दशकंठ। करील नानाविध कपट। तंवचि वानरीं उद्भट। लंकात्रिकूट जाळावें॥८॥ ऐकतांचि सुग्रीववचन। रातोरातीं वानरगण। अग्निचूडी घेवोनि जाण। लंकादहन मांडिलें॥९॥ हातीं घेवोनि अग्निचूडी। वानरवीरांचिया कोडी। लंकेमाजी घालोनि उडी। आगी धडाडी लाविती॥१०॥

उल्काहस्तैर्हरिगणैः सर्वतः समभिद्रुताः। आरक्षस्था विरूपाक्षा राक्षसाः संप्रदुद्रुवुः॥५॥
गोपुराट्टप्रतोलीषु चर्यासु विविधासु च। प्रासादेषु च संहृष्टाः ससृजुस्ते हुताशनम्॥६॥
तेषां गृहसहस्राणि ददाह हुतभुक्तदा। तेषां शतसहस्राणि रक्षसां पुरवासिनाम्॥७॥
अदहत्पावकस्तत्र जज्वाल च पुनः पुनः॥८॥

---

शब्दार्थ : १. हाडे, २. आकाश, ३. बलवान्, पराक्रमी, ४. मुख्य मुख्य योद्ध्यांसह, ५. अपूर्व, ६. क्षणात.

वानरसैन्याची लंकादहनाची कामगिरी: उल्काहस्ती[1] वानरवीर। जाळूं आले लंकापुर। देखोनि राखते निशाचर।अति सत्वर पळाले ॥११॥ ठेवोनि राक्षससैन्यासी। नगर रक्षितां विरूपाक्षासीं। येतां देखोनि वानरांसी। तोही धाकेंसीं पळाला॥१२॥ पळतां देखोनि निशाचर। पाठी लागती वानर। येतां मारिले घरटीकार[2]। जाळिले अपार जागेकरी॥१३॥ जेथें जेथें जागेकरांची घरें। तेथे तेथें आग लाविती वानरें। बाहेर निघावया निर्गम न पुरे। जाळितां वानरें समग्रें॥१४॥ घरें मंदिरें धवळारें। रम्य वाडिया गोपुरें। प्रसाद[3] पौळी[4] शिखरें। जाळित वानरें अति क्षोभें॥१५॥ शरबंधी बांधले राघवेंद्र। अति नष्ट हे निशाचर। इंद्रजित जाळूं दशशिर। लंकापुरा पुरदाहो॥१६॥ ऐसें बोलोनि वानर। जाळूं आदरिलें[5] नगर। सहस्रसंख्या लक्षांतर। असंख्या कारगृहदाहो॥१७॥ माणिकनिबद्ध अवनी। रत्नजडित स्तंभश्रेणी[6]। मुक्ताफळें मंडपाभरणीं। उत्तमां भवनी महादाहो॥१८॥ लहानसहान घरें। आगी न लाविती वानरें। सुंदर भवनें सुप्रकारें। तीचि आदरें जाळिती॥१९॥ सुंदर मनोहर गृहांसीं। शोधून जाळिती साक्षेपेंसी। वानर पडले द्वंद्वासीं। आगी चौपासी लाविली॥२०॥ हनुमंतें जाळिलें नगर। तेव्हां दिवसा होता दिनकर। हा रात्रिंदाहो निर्धार। स्त्रिया कुमर कळकळती ॥२१॥ आगी लाविली चौफेरीं। पळती राक्षसांच्या हारी। आकांत होत नरनारीं। आपांपरी[7] नगरस्थां॥२२॥ दंपत्यें निजसेजेसीं। निद्रिस्थ असतां दोहींसीं। जळोनियां जैसीं तैसीं। गृहदाहेंसीं भस्मात॥२३॥ नाना सामग्री उपकरण। शस्त्रास्त्र अंगत्राण। धनुष्यबाणेंसीं वोढण[8]। वस्त्राभरण जाळित॥२४॥ पुरुष उठवितां स्त्रियेसीं। ते म्हणे सुखें भोगा कामासीं। आगी लागली गृहासी। नीघ वेगेंसीं निस्संगे[9]॥२५॥ जेथींच्या तेथें घरोघरीं। राक्षस जळती निद्राभरीं। बहुतां रिघु न पुरे बाहेरी। अग्नीमाझारी कोंडलीं॥२६॥ हाका देती शंखस्फुरणें। आक्रंदती अति सत्राणें[10]। दुर्धर अग्नीचें जाळणें। कोणासी कोणें राखावें॥२७॥ आगी कोंडोनी चौफेर। महायोद्धे दहा सहस्र। जळोनि मेले निशाचर। घोरांदर आकांत॥२८॥ अग्नि खवळला अनिष्ट। चहूंकडे धडधडाट। लंकेमाजी न चले वाट। कलकलाट राक्षसां॥२९॥ शरबंधी करोनि कपट। श्रीराम बांधिला वरिष्ठ। त्याचें फळ हें अनिष्ट। होत तळपट राक्षसां॥३०॥

शयनेषु महार्हेषु प्रसुप्तानां प्रियैः सह। त्रस्तानां गच्छतां चैव पुत्रानादाय सत्वरम्॥९॥
धूमजालपरीतांगा बहवो परमार्दिताः। राक्षसा विनदंति स्म वन्हिज्वालाभयाकुलाः॥१०॥

लंकादहनामुळे जनतेची दुर्दशा : घरोघरींचीं समस्त। महामंचकी सुनिश्चित। स्त्रीपुरुषें निद्रान्वित। अग्नि तेथ पोळित पावे॥३१॥ स्त्रिया पुत्र घेवोनि पळती। पुरुष गजबजिले आक्रंदती। घरोघरीं हाका देती। धूमाकुलित आरडत॥३२॥ धूमाकुलित न दिसे वाट। अग्नि पोळित चटचट। राक्षसांसी भवंत आट। अति कष्ट स्त्रीबाळां॥३३॥ राक्षस पडले ज्वलनावर्तीं[11]। ज्वालाकुलित झाली क्षिती[12]। सहसा निर्गम न पावती। हाका देती आक्रोशें॥३४॥ जे जे राक्षस बाहेर येती। ते ते उचलोनि जुत्पती। अग्नीमाजी निक्षेपिती[13]। द्वंद्वानुवृत्तीं वानर॥३५॥ शरबंधी धरिला रामचंद्र। तेणें रागें पैं वानर। जाळूं आदरिले निशाचर। लहान थोर कवळोनी॥३६॥ श्रीराम परब्रह्म स्पष्ट। त्यासीं राक्षसीं केलें कपट। त्यांचें करावें तळपट। द्वंद्वा मर्कट पेटले॥३७॥ जे राक्षस बाहेर येत। त्यांस कपि घालिती अग्नीत। राहूं जातां लंकेआत। ज्वलनावर्त[14] जाळित॥३८॥ ऐसा राक्षसां आकांत। आरंभिला लंकेआंत। हाकबोंबेचा आवर्त। प्रळयांत नगरस्थां॥३९॥

शब्दार्थ : १. अग्निचूडी हातात घेऊन, २. गस्तवाले, रक्षक, ३. वाडे, ४. कोट, ५. प्रारंभ केला, ६. अनेक खांब, ७. दुर्दशा, ८. ढाल, ९. निर्लज्जे, १०. आवेशाने, ११. अग्नीच्या फेऱ्यांत १२. पृथ्वी, १३. फेकतात, १४. अग्निचक्र, अग्नीचा फेरा.

उष्ट्रैर्मुक्तैर्गजैर्मुक्तैर्मुक्तैश्च तुरगैरपि। बभूव लोको लंकायां भ्रांतग्राह इवार्णवः ॥११॥
अपरे हेमकाक्षाश्च संनद्धा वरवारणाः। त्रस्ता बंधात्समाक्षिप्य येन केन प्रदुद्रुवुः ॥१२॥
पानीयं पातुमिच्छंतः परिभ्रमणतर्षिताः। प्रतिबिंबं जले दृष्ट्वा तमग्निमिति मेनिरे ॥१३॥

देखोनियां दहनावर्त। हस्ती घोडे कऱ्हे[1] मुक्त। अग्निभयें अति भ्रांत। परिभ्रमत अव्हासव्हा[2] ॥४०॥ अवघीं जळतृषातृषित। उदकप्राशर्थ येत। अग्निप्रतिबिंब जळांत। देखोनि पळत माघारीं ॥४१॥ जळ नव्हे तो मानूनि अग्नी। पळती उदक न घेऊनी। ऐसी परी लंकाभुवनीं। अग्निदहनीं आकांत ॥४२॥ धनुष्य सज्जोनि लक्ष्मण। विंधोनियां अग्निबाण। करितां राक्षसां कंदन। लंकाभुवन कळकळित ॥४३॥ भेदितां सौमित्राच्या शरीं। आक्रंदती नरनारी। बोंब सुटली निशाचरीं। आपांपरी राक्षसां ॥४४॥

लंकानगरीतील दुर्दशा पाहून श्रीराम लंकादहन थांबवितात : ऐसें देखोनियां कंदन। कृपेनें द्रवला रघुनंदन। निवोरोनि लक्ष्मण। बोले आपण सुग्रीवासी ॥४५॥ विंधोनियां अग्निबाण। निद्रितांचें करितां दहन। आम्हांसी पुरुषार्थ कोण। निंद्य लक्ष्मण क्षात्रधर्मा ॥४६॥ दहनीं[3] घालोनि लंकाभुवन। जाळितां निद्रितादि जन। तरी काय मारिला दशानन। निंद्य लक्षण क्षात्रधर्मा ॥४७॥ रात्रीमाजी द्वंद्व[4] जें करणें। चोरोनियां अग्नि लावणें। हीं तंव अधर्माचीं चिन्हें। लाजिरवाणें क्षात्रधर्मा ॥४८॥ बाहेर आल्या रणांगणीं। मारीन वीरांचिया श्रेणी[5]। धडमुंडाकित धरणी। अर्धक्षणीं मी करीन ॥४९॥ मज असतां श्रीरामचंद्रा। कासया राक्षसांचा दरारा। विंधोनियां बाणधारा। दशशिरा निवटीन ॥५०॥ निवारोनियां लक्ष्मण। वर्जोनियां वानरगण। न जाळावे निद्रित जन। लंकाभुवन न जाळांवे ॥५१॥ निद्रित जाळितांचि देख। अंगीं लागे महापातक। तें वर्जोनि रघुकुळटिळक। युद्ध संमुख करूं इच्छी ॥५२॥ संमुखा संमुखी अति निर्वाण। करावया रावणासीं रण। सैन्य सज्जावें संपूर्ण। रघुनंदन आज्ञापी ॥५३॥ ऐकोनि श्रीरामवचन। सुग्रीव घाली लोटांगण। हरिखें[6] गर्जोनि आपण वानरगण नेमित ॥५४॥

आदिष्टा वानरेंद्रास्ते सुग्रीवेण महात्मना। आसन्नं द्वारमाविश्य प्लवंगा युद्धकांक्षिणः ॥१४॥
यश्च वो वितथं कुर्यात्तत्र शत्रावुपस्थिते। स हन्तव्योऽभिसंहत्य बलवान्यः पलायते ॥१५॥

अंगदाची घोषणा : रावणासीं करावया रण। श्रीरामें नेमिलें आपण। सुग्रीवआज्ञा अति दारुण। वानरगणनियमार्थीं[7] ॥५५॥ आजिंचें करितां रणांगण। वेंचावा श्रीरामाकाजीं प्राण। मागें पळाला तो जाण। अंगदें आपण मारावा ॥५६॥ मातुळ मावसा मेहुणा नातू। चुलता पुतण्या बंधु सुतु[8]। स्त्रियेचा बंधु अत्यंत आप्तु। करावया घात रणीं सरतां ॥५७॥ श्रीरामकाजीं वंचकपण[9]। त्यासी मारावें आपण। त्याचा घेतल्याही प्राण। दोष दारुण बाधेना ॥५८॥ अंगद बोलिला हांसोन। पळत्या देवोनि अभयदान। मी मारीन दशानन। रणविंदान पैहा माझें ॥५९॥ ऐकोनि अंगदाची मात। संतोषला श्रीरघुनाथ। टाळी पिटली वानरांत। रणीं लंकानाथ वधावया ॥६०॥ दिवस उगवतांचि जाण। देखोनि लंकादहन। कोपा चढला दशानन। खात दशन[10] अति रागें ॥६१॥ कुंभकर्णाचे कुमर। कुंभानिकुंभ महाशुर। युद्धा धाडिले सत्वर। नरवानर मारावया ॥६२॥ कुंभ निकुंभ दोघे जण। वाढिवें[11] गर्जत आपण। वानर बापुडे ते कोण। रामलक्ष्मण निर्दळूं[12] ॥६३॥

लंकायं निर्ययुर्द्धाराह्नदंतो भीमाविक्रमाः। कुंभकर्णात्मजौ वीरौ परिगृह्य समंततः ॥१६॥
बहुसैन्यैः परिवृतौ शीघ्रं रावणनोदितौ। भीमं च रथमातंगहयवाहनसंकुलम् ॥१७॥

---

शब्दार्थ : १. उंटे, २. अव्यवस्थित रीतीने, ३. अग्नीमध्ये, ४. युद्ध, लढाई, ५. समुदाय, ६. आनंदाने, ७. वानरांला हुकुमांत ठेवण्याविषयी, ८. मुलगा, ९. कपट, १०. दांत, ११. शौर्याच्या आवेशाने, १२. ठार करू.

तद्दृष्ट्वा बलमायातं राक्षसानां महत्तदा। संचचाल कपीनां तु बलमुच्चैर्ननाद च ॥१८॥

कुंभ व निकुंभ ससैन्य लंकेमधून बाहेर पडले : कुंभ निकुंभ दोघां वीरीं । सैन्य सज्जोनि समग्रीं। निघालें लंकेबाहेरी। वीर गजरीं गर्जती ॥६४॥ रथाश्वेंसीं मत्त मातंग[1]। सन्नद्ध बद्ध चतुरंग। कुंभकर्ण पुत्र चांग। वीर निर्व्यंग युद्धार्थी ॥६५॥ रावणाचे आज्ञेवरी। नाना वाद्यांचे गजरीं। दोघे निघतांचि बाहेरी। येतां वानरीं देखिले ॥६६॥ देखोनि राक्षसांचें दळ[2]। रणीं खवळले गोळांगुळ[3]। युद्धा मिसळले तत्काळ। रणकल्लोळ माजविला ॥६७॥ रामनामाचा गजर। वानरीं केला भुभःकार। सिंहनादें निशाचर। घोरांदर गर्जती ॥६८॥ कात्या तोमर त्रिशूळ भालें। राक्षस युद्धा मिसळले। वृक्षपर्वत शालतालें[4]। वानर बळें भिडताती ॥६९॥ वानर आणि निशाचर। युद्धा पेटले दुर्धर। नोकोनियां[5] येरां येर। घाय निष्ठुर हाणिताती ॥७०॥ राक्षस आणि वानरगण। ज्याची जैसी आंगवण। युद्ध करिती भिन्न भिन्न। रणप्रवीण रणयोद्धे ॥७१॥ युद्ध करितां निशाचर। पाठीराखे येरां येर। तैसेचि योद्धे कपिकुंजर। येरां येर रक्षिती ॥७२॥

प्रवरानभितो जघ्नू रक्षसामंतरे स्थितान्। घ्नंतमन्यं जघानान्यः पतितोन्यमपातयत् ॥१९॥
गर्हमाणं जगर्हान्यो दशंतमपरोऽदशत्। देहीत्यन्यो ददात्यन्यो ददामीत्यपरः पुनः ॥२०॥
रक्षसां दशसप्तेति वानरा जघ्नराहवे। वानरानपि सप्ताष्टौ दश राक्षसपुंगवाः ॥२१॥

राक्षस व वानरसैन्यांचे युद्ध : मथून राक्षसव्यूहसंबंध। वाढिवा लाठिवा[6] वीर प्रबद्ध[7]। त्यांसीं वानरीं द्वंद्वयुद्ध। अति सुबद्ध आदरिलें ॥७३॥ महावीर रणप्रवीण। अंगी प्रबळाची आंगवण। येरयेरांतें पाचारून। नामें घेऊन भिडती ॥७४॥ आम्ही श्रीरामाचे दूत। रामनामें घाया हाणित। तैसेच राक्षस विख्यात। रणीं भिडत रणमारें ॥७५॥ एक एकातें घाय हाणित। तोहीं घाया घाय देत। एक एकातें तळीं पाडित। तोही पडत उलथोनी ॥७६॥ वानर अशक्त पालेखाइर। तुम्हांसीं युद्धीं कैंचा धीर। तुम्ही महापापी निशाचर। चोरटी धूर परद्वारी ॥७७॥ चोरीमारी परद्वारी। इतुकीं पापें दशशिरीं[8]। त्याचे तुम्ही सहाकारी[9]। पापाचारी अशक्त ॥७८॥ पापें मारिलें तुम्हांसी। मारणें न लगे आम्हांसीं। ऐसें निंदून राक्षसांसी। कपि आवेशीं भिडती ॥७९॥ श्रीराम स्वयें सोज्ज्वळ। नित्य निष्पाप निर्मळ। तुमची धूर[10] कष्मळ[11]। पापी केवळ परदारी ॥८०॥ त्या पाप्याचे होवोनि दूत । संग्रामासीं आलेति येथ। जयो न पावां निश्चित। रणीं समस्त मराल ॥८१॥ राक्षसां डसती वानर। वानरां डसती निशाचर। पुच्छें ठोकोनि सत्वर। फोडिती वक्त्र[12] राक्षसांचें ॥८२॥ घायें करोनि दंत भग्न। भूमीं पाडोनि दशन[13]। राक्षसांसी करोनि कंदन। कपिगण गर्जती ॥८३॥ एक म्हणे राहें साहें। दुजा म्हणे पुढें पाहें। माथां हाणिती दुर्धर[14] घाये। रुधिर वाहे भडभडां ॥८४॥ दे दे म्हणती निशाचर। घाय देती वानर। अशुद्धाचा[15] वाहे पूर। घोरांदर[16] रणमार ॥८५॥ राहें साहें धरीं धीर। घाय साहे तो महाशूर। नोकोनियां येर येर। करिती मार रणमारें ॥८६॥ एवं राक्षस गोळांगूळ[17]। युद्धीं भिडती अति तुंबळ। रणीं खवळला रणवेताळ। हलकलोळ रणांगणीं ॥८७॥ वानरवीर रणाआंत। राक्षस दहा पांच सात। एक वेळे करिती घात। रणोन्मत्त महामारें ॥८८॥ याचि परी राक्षसवीर। सप्ताष्टदश वानर। घायें मारिती निशाचर। रणीं दुर्धर गर्जोनी ॥८९॥ ऐशापरी रणांगणीं। वीरां वानरां झोंटधरणी। होतां देखूनियां नयनीं। आला गर्जोनि अंगद ॥९०॥

---

**शब्दार्थ :** १. हत्ती, २. सैन्य, ३. वानर, ४. शाल व तालवृक्ष, ५. निर्भर्त्सना करून, ६. बलाढ्यपणाने, ७. महाबुद्धिवान्, ८. रावणाचे ठिकाणी, ९. मदतनीस, १०. मुख्य, ११. पापयुक्त, १२. तोंड, १३. दांत, १४. भयंकर, १५. रक्ताचा, १६. भयंकर, १७. वानर.

प्रवृत्ते संकुलेऽत्यर्थ तस्मिन्वीरवरक्षये। अंगदोऽकंपनं वीरमाससाद रणोत्कटः॥२२॥

आहूय सोंऽगदं कोपात्ताडयामास वेगतः। गदयाकंपनः श्रीमान्स पपाताचलोपमः॥२३॥

अंगदाच्या शिळाप्रहाराने अकंपनाचा वध : कुंभनिकुंभाचा प्रधान। मुख्य सेनानी अकंपन। त्यासी उत्कट करावया रण। अंगद आपण पाचारी॥९१॥ अंगद येतांचि गर्जत। अंकपनें गदाघात । हाणोनि पाडिला मूर्च्छित। जेंवी पर्वत वज्रघातें॥९२॥ मूर्च्छा सांवरोनि सत्वर। उठोनियां अंगद वीर। रागें हाणोनि शिळाशिखर। केला शतचूर अकंपन॥९३॥ न मांगता प्यावया पाणी। अकंपन पाडिला रणीं। राक्षससैन्या जाली भंगाणी[1]। गेले पळोनी कुंभाप्रती॥९४॥ राक्षसांचे सैन्यसंभार। धाकें पळोनि सत्वर। कुंभ निकुंभ महावीर। आले समग्र त्यांपासीं॥९५॥ अकंपनाचा केला घात। हांक वाजली सैन्याआंत। तेणें कुंभ क्रोधान्वित। शरचापयुक्त चालिला॥९६॥

आपतंतीं च वेगेन कुंभस्तां सांत्वयन् चमूम् । तेन हाटकवर्णेन पत्रिणा चित्रवाससा॥२४॥

आकर्णकृष्टमुक्तेन विव्याध द्विविदं बली। स तयाभिहतस्तेन विप्रमुक्तपदः स्फुटम्॥२५॥

निपपाताद्रिकूटाभा विव्हलो गाढवेदनः। कुंभमम्यपतत्क्षिप्रं प्रगृय महतीं शिलात्॥२६॥

तां शिलां सलताजालां तस्मै चिक्षेप रक्षसे॥२७॥

कुंभराक्षसाचा क्रोधाने अंगदावर हल्ला : मारिलिया अकंपन। पळत आलें राक्षससैन्य। त्यासी कुंभे आश्वासून। निघे आपण संग्रामा॥९७॥ कुंभ योद्धा महाशूर। श्रेष्ठ श्रेष्ठ वानरवीर। शोधोनियां विंधी वीर। लहानथोर मारीना॥९८॥ वानरसैन्यीं नाना व्यक्ती। त्यांते कुंभ न धरी हातीं। श्रेष्ठ श्रेष्ठ जे जुत्पती[2]। बाण त्यांप्रती विंधित॥९९॥

द्विविद व मैंद कुंभाकडून मूर्च्छित पडले : धनुष्यबाण स्वयें सज्जूनी। आकर्णांत वोढी काढूनी। द्विविद विंधोनियां बाणीं। पाडिला रणीं मूर्च्छित॥१००॥ बाणीं विंधितां सुदृढ। द्विविद पाडिला गाढ मूढ। वीरशूरयुद्धकैवाड। रणसुरवाड[3] संग्रामीं[3]॥१॥ मूर्च्छित पडतांचि द्विविद। बंधु क्षोभला महामैंद। कुंभासीं करावया युद्ध। सन्नद्ध बद्ध चालिला॥२॥ वृक्षवल्ली द्रुम[4] सकळा। सपर्वत उपडोनि शिळा। घालिता कुंभाच्या कपाळां। तेणें तत्काळ छेदिली॥३॥ विंधोनियां पांच बाण। शिळा छेदून केली शतचूर्ण। मैंदासी शर दारुण। विंधी आपण साटोपें॥४॥

वक्षस्यापि च तेनासौ मैदं विव्याध राक्षसः। रुधिरानुगतो भूमौ निपपात हि मूर्च्छितः॥२८॥

ततोंऽगदस्तौ पतितौ मातुलावभिजग्मिवान्। अभिदुद्राव वेगेन कुंभमुद्यतकार्मुकम्॥२९॥

तमापतंतं विव्याध कुंभः पंचभिरायसैः। त्रिभिश्चान्यैस्त्रिभिर्बाणैर्मातंगमिव तोमरैः॥३०॥

अंगद -कुंभ युद्ध : मैंदे सोडिला शिळा पर्वत। कुंभें छेदोनि समस्त। सुवर्णपत्री बाण युक्त। हृदयाआंत विंधिला॥५॥ हृदयीं भेदतां तो शर। वमून रुधिरांचे पूर। मूर्च्छित मैंद वानर। रणीं सत्वर पाडिला॥६॥ मैंद द्विविद वीर प्रबळ। दोन्ही अंगदाचे मातुळ। रणीं पडतां अति विव्हळ। अंगद तत्काळ क्षोभला॥७॥ करावया कुंभाचा घात। अंगदें उपडोनि पर्वत। धांविन्नला त्वरान्वित। रणीं गर्जत साटोपें॥८॥ कुंभें विंधोनि पांच बाण। येतां पर्वत केला चूर्ण। अंगदासी तीन बाण। अति सत्राण विंधिले॥९॥ अंगद वीर अति विख्यात। जरी बाणीं जाला जर्जरित। तरी कुंभाचा करावया घात। सवृक्षहस्त स्वयें आला॥११०॥ पर्वतामागें पर्वत। वृक्षामागें वृक्ष वर्षत। कुंभ करितां अस्ताव्यस्त। तोही सावचित्त रणमारीं॥११॥ कुंभवीर रणाभिनिवेशीं[5]। तोडोनि वृक्षपर्वतांसी। अगद विंधिला भ्रूपदेशीं।

शब्दार्थ : १. नाश, २. वीर, ३. युद्धाविषयी आनंद, ४. वृक्ष, ५. युद्धाच्या आवेशाने.

रुधिर त्यासी सुटलें ॥१२॥ गज आवरिजे अंकुशेंसीं। तेंवी अंगद बाणेंसीं। नावरेचि युद्धाभिनिवेशीं। शालहस्तेंसीं लोटिला ॥१३॥

अंगदः पाणिना नेत्रे विमृज्य रुधिरोक्षितः। शालमासन्नमेकांते परिजग्राह पाणिना ॥३१॥
तमिंद्रकेतुप्रतिमं शालं शालभुजो बली। उत्ससर्जांगदो वेगात्तं दूरादन्ववैक्षत ॥३२॥

अंगदाला मूर्च्छा : अंगदकपाळीं विंधिला शर। प्रवाहें अशुद्धाचा[१] पूर। नेत्रींचें पुसोनियां रुधिर। अंगद सत्वर धांविन्नला ॥१४॥ जैसा इंद्राचा इंद्रकेत। तैसा शोभे शालहस्त। लाता हाणोनि सारथि रथ। केला निःपात रणभूमीं ॥१५॥ आम्ही म्हणों हे वानर। हीन दीन पालेखाइर। तंव हे निधडे महाशूर। पूर्ण जुंझार रणरंगी ॥१६॥ शाल हाणितां सत्वर। कुंभ निधडा धनुर्धर। सतेज विंधोनियां शर। शाल समग्र छेदिला ॥१७॥ हेमपुंखी[२] सरले शर। धगधगीत तेजाकार। अंगद विंधिला वानर। वज्रधार दृढ बाणीं ॥१८॥ सबळ अंगदाचें उड्डाण। हृदयीं भेदतां वज्रबाण। क्षितीं पडला मूर्च्छापन्न। आपणा आपण विसरला ॥१९॥ युवराजा पडतां क्षितीं। कोपें खवळले जुत्पती। युद्ध करावया कुंभाप्रती। कोट्यनुवृत्ती चालिले ॥१२०॥

अंगदं व्यथितं दृष्ट्वा सीदंतमिव कुंजरम्। दुराधर्षं राजपुत्रं धूम्रो ह्भ्यवपद्यत ॥३३॥
अथ धूम्रः शिलाहस्तः कोपसंरक्तलोचनः। रिरक्षिषंतोऽभ्यपतन्नंगदं वानरर्षभाः ॥३४॥

धूम्र व जांबवंताकडून अंगदाचे रक्षण : अंगद युवराजा विख्यात। रणीं पडतांचि मूर्च्छित। कुंभ होवोनि हर्षयुक्त। त्यासी नगरांत नेऊं पाहे ॥२१॥ भंगिला रथ सारथी। अंगद न्यावा कैशा रीतीं। कुंभ विचारी जंव चित्तीं। तंव धूम्राची अवचितीं उडी आली ॥२२॥ धूम्र वीर तयेकाळीं। आरक्त नयन क्रोधानळीं। पर्वत झेलीत करतळीं। कुंभाजवळी पातला ॥२३॥ बाणपिसारियाचा वारा। धूम्र उडविला अंबरा[३]। तेणें हाहाकार वानरां। निशाचरां आल्हाद ॥२४॥ धूम्र ज्येष्ठ बंधु जांबवंतां । त्यासी रणीं कुंभे गांजितां। नाही अंगदासी रक्षिता। तेणें जांबवंता कोप आला ॥२५॥ जांबवंत निघे आपण। सवें निघाला सुषेण। वेगदर्शी वानर जाण। करावया रण चालिला ॥२६॥ येतां देखोनि वानरांसी। कुंभ वीर रणभिनिवेशीं । बाणीं खुंटलें कपिमार्गासी। अंगदापासीं येवो नेदी ॥२७॥ वर्षोनियां शरौघ[४]। कपिप्रताप केला मोघ[५]। बाणीं खिळिलें सर्वांग। रणोद्योग[६] चालेना ॥२८॥ जेंवी कां वायु आकाशासी। तोडोनि ने मेघजालासी[७]। तेंवी कुंभे वानरांसी। बाणभिनिवेशी वारिलें ॥२९॥ अंगद धरिला राजकुमर। रणीं उठला हाहाकार। तें देखोनि सुग्रीव वीर। कोपें दुर्धर चालिला ॥१३०॥ सांडोनि कुंभबाणमार्गासी। अलक्ष उडोनि आकाशीं। सुग्रीव आदळला अंगेसीं। अंगद पाठीसीं घालोनी ॥३१॥

कुंभस्य धनुराच्छिद्य बभंजेंद्रायुधोपमम्। अवप्लत्य ततः शीघ्रं कृत्वा कर्म च दुष्करम् ॥३५॥
अब्रवीत्कुपितः कुंभं भग्नशृंगमिवर्षभम्। कृतं कर्म परिश्रांतो विश्रांतः पश्य मे बलम् ॥३६॥
तेन सुग्रीववाक्येन सावमानेन मानितः। ततः कुंभः समुत्पत्य सुग्रीवमभिपत्य च ॥३७॥

सुग्रीव-कुंभ मुष्टियुद्ध : सुग्रीवें घालोनि उडी । कुंभाचें धनुष्य आसुंडी[८] । रागें मोडोनि कडाडीं। आदळला प्रौढी अंगेसीं ॥३२॥ जैसें इंद्रचाप आकाशीं। तैसे धनुष्य कुंभापाशीं। सुग्रीवें मोडून आवेशीं। काय त्यासी बोलत ॥३३॥ तुवां घेऊन धनुष्यबाण। रणीं त्रासिले वानरगण। तें म्यां चाप भंगिल्या जाण। आतां आंगवण तुज कैंची ॥३४॥ भग्नशृंग वृषभासी[९]। जेंवी न करवे संग्रामासी। तेंवी भंगिल्या चापासी। प्रौढी युद्धासी तुज कैंची ॥३५॥ आजवरी

शब्दार्थ : १. रक्ताचा, २. सुवर्णखचित पिसाऱ्याचे. ३. आकाशात, ४. बाणा समूह, व्यर्थ, ५. निष्फल, व्यर्थ, ६. युद्धांत पराक्रम, ७. मेघसमूहाला ८. हिसकले, ९. बैलाला.

म्यां रणीं। वीर मारिला नाहीं कोणी। प्रथम करीन तुझी बोहणी। पुढें वीरश्रेणी[1] मारावया॥३६॥ ऐसे सुग्रीवाचे उत्तरी। कुंभासीं कोप आला भारी। कोपें मुष्टि उरावरी। वज्रप्रहारीं हाणितली॥३७॥ फोडोनि देहींच्या चर्मासीं। मुष्टि पावली अस्थीपासीं। भेदून अंगीच्या वर्मासी। अति आवेशीं हाणिता॥३८॥ येवढी कुंभाची मुष्टी। सुग्रीवें नेली तृणासाठीं। अशुद्धे डवरला[2] जगजेठी। रणसंतुष्टी डुल्लत॥३९॥ जैसा गेरुका[3] मिरवे मेरू। कां वडवाग्नी सागरू। अशुद्धे डवरला वानरू। रणीं परम शोभत॥१४०॥

स तथाभिहतस्तेन सुग्रीवो वानरेश्वरः। मुष्टिं संवर्तयामास वज्रवेगां महाबलः॥३८॥

मुष्टिं संपातयामास कुंभस्योपरि वानरः। मुष्टिनाभिहतस्तेन निपपात स राक्षसः॥३९॥

कुंभराक्षसाचा वध : कुंभ महाबळी वीर। मुष्टी हाणितां निष्ठुर। डंडळेना सुग्रीव वीर। वानरेश्वर प्रतापी॥४१॥ सुग्रीवें वळोनि वज्रमुष्टी। कुंभास हाणितां उठाउठीं। फोडोनि मस्तकाची कवटी। पाडिला सृष्टीं निष्प्राण॥४२॥ कुंभ पडिला महावीर। विजयी झाला वानरेश्वर। वानर करिती जयजयकार। नामें अंबर[4] गर्जत॥४३॥ स्वयें उठोनि श्रीरघुनाथ। आलिंगिला वानरनाथ। सुग्रीव होवोनि लज्जान्वित। काय बोलत तें ऐका॥४४॥ कुंभ कायसें बापुडें। रणीं मारिलें म्यां किडें। तें यश मिरवूं तुजपुढें। हें तंव कुडें मजलागीं॥४५॥ रावणाच्या दहाही शिरांसी। मुरडोनि आणीन पायांपासीं। तेचि मी करीन सेवेसी। पुरुषार्थेंसीं सुग्रीव॥४६॥ ऐसें सुग्रीवाचें वचन। उल्लासें मानी रघुनंदन। एका जनार्दना शरण। कुंभनिर्दळण रणीं झालें॥४७॥ कुंभाचा रणीं केला घात। क्षोभला निकुंभ विख्यात। त्यासी मारील हनुमंत। कथावृत्तांत अवधारा॥१४८॥ स्वति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां कुंभवधो नाम चतुस्त्रिंशत्तमोऽध्यायः॥३४॥ ओंव्या॥ १४८॥ श्लोक॥३९॥॥ एवं ॥१८७॥

## अध्याय पस्तिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### मकराक्षाचा वध

कुंभ पडल्यावर निकुंभाचे रणांगणावर आगमनः सुग्रीवें झोंटधरणी। कुंभ पाडिलिया रणीं। तें देखोनिया नयनीं। निकुंभ क्षोभोनी चालला॥१॥

निकुंभो भ्रातरं दृष्ट्वा सुग्रीवेण निपातितम्। प्रदहन्निव कोपेन सुग्रीवं प्रत्यवेक्षत॥१॥

कृतसंग्राममालं च दत्तपंचांगुलं शुभम्। आददे परिघं घोरं नगेंद्रशिखरोपमम्॥२॥

निकुंभो भूषणेर्भाति परिघेणायतेन च। नगर्या विटपावत्या गन्धर्वनगरैरपि॥३॥

सहसैवामरावत्या सर्वैश्च भुवनैः सह। निकुंभपरिघोद्भूतं भ्रमतीव नभस्थलम्॥४॥

निकुंभाच्या परिघ आयुधाने वानरसैन्याची दाणादाण : कुंभ पडतांचि रणीं। निकुंभ चालिला कोपोनी। सुग्रीवा जाळिले नयनीं। क्रोधोन्मादीं[5] अवलोकी॥२॥ मागें बहुतां रणांगणीं। जेणें केलिया संग्रामश्रेणी। जो दादुगा अरिदळणीं। तो परिघ घेवोनि चालिला॥३॥ परिघमाथां पंचपांकोळी[6]। दृढ धरिला पंचागुळीं। निकुंभ वीर महाबळी। घेऊन करतळीं चालिला॥४॥ मुकुटकुंडलें पदक कंठीं। बाहुभूषणें सुगंध उटी। अंगत्राण[7] लखलखाटी। परिघ मुष्टीं डुल्लत॥५॥ परिघ साधन प्रत्यावृत्ती। अमरावती अलकावती। बसतां हातीं बीट पावती। भ्रमणावर्तीं पाडिल्या॥६॥ भ्रमे गंधर्वांचें नगर। सचंद्र तारा ग्रह समग्र। परिभ्रमतां परिघाग्र। काळचक्र परिभ्रमे॥७॥ निकुंभाअंगी प्रबळ बळ। परिघ साधोनि अति कुशळ। भ्रमत भासे नभोमंडळ। भासे भूतळ परिभ्रमतें॥८॥ परिघाच्या भ्रमणद्वारा। छेदिलें

शब्दार्थ : १. वीर समूह, २. भरला, शोभला, ३. कावेने, ४. आकाश, ५. क्रोधाच्या आवेशाने, ६. पाच पाकळ्या, ७. कवच.

वृक्षशिळाशिखरां। पुढें रिघवेना वानरां। परिघधारामहामारें॥९॥ भंवता परिघाचा आवर्त। न चले वानरांचा पुरुषार्थ। कपिप्रताप गेला व्यर्थ। संग्रामार्थ चालेना॥१०॥ वानर होतां लज्जान्वित। देखोनि आला हनुमंत। पहावया निकुंभाचा पुरुषार्थ। संग्रामीं येत संमुख॥११॥

हनुमंताचे आगमन व निकुंभाशी युद्ध : हनुमान म्हणे निकुंभवीरा। तुझ्या परिघाचा थोर दरारा। आधीं मज मारीं वानरा। मग पुढारां संग्राम॥१२॥ मारिले सुर नर समस्त। दैत्य दानवां केला घात। मज मारिल्या हनुमंत। तुझा पुरुषार्थ कळेल॥१३॥ मागील बडिवाराचे बोल। आज मी करीन तुझे फोल। पाहूं पां किती तुझें बळ। परिघें प्रबळ हाण मज॥१४॥ ऐकोनि हनुमंताच्या उत्तरा। दांत खावोनि करकरां। परिघ भोवंडोनि गरगरां। मारूं वानरां धांवला॥१५॥ परिघ गाळीव लोहान्वित[1]। सुवर्णबंदी रत्नांकित। पाचपिरोजीं लखलखित। सिंदुरार्चित नरमांसें॥१६॥ निकुंभें परिघ घेवोनि करीं। भोवंडोनि चक्राकारी। हाणितां हनुमंताचे उरावरी। शतसहस्त्री भंगला॥१७॥ वज्रदेही कपि बळकट। लागतां परिघ झाला पीठ। निकुंभ करी कटकट। म्हणे फटफट हनुमंत॥१८॥ तुझे अंगीं पोंचट बळ। घाव हाणिती तो पोकळ। परिघ जैसा एरंड सरळ। गेला तत्काळ मोडूनी॥१९॥ पुढां तिखट मागें पोंचट। तैसे तुझे बोल फळकट। वृथा संग्रामीं करिसी कष्ट। आजि तूं स्पष्ट मरसील॥२०॥ कंप न येचि धराधरा[2]। आकाश कांपेना थरथरां। तेंवी मज हनुमंता वीरा। नाहीं भेदरा परिघाचा॥२१॥ गज हाणितां फुलेंसीं। तैसा परिघ हनुमंतासीं। नाहीं मूर्च्छा ना कासाविसी। रणाभिनिवेंशीं गर्जत॥२२॥ जेंवी गगनीं उल्कापात[3]। तेंवी परिघखंडें समस्त। उडोनि पडलीं धगधगीत। लखलखित धरेवरी[4]॥२३॥ तुझा घेतां परिघघात। तेणें मी झालों रिगाईत। उतराई व्हाया येत। मुष्टिघात साहें माझा॥२४॥ निकुंभाचा परिघघात। हनुमंतें केला व्यर्थ। त्यासी हाणावया मुष्टिघात। जाला उदित वानर॥२५॥ पंचांगुळीं अंगुष्ठनेटीं। दृढ वळोनि वज्रमुष्टी। निकुंभा हाणितां नेटपाटीं। पाडिला सुष्टीं धुकधुकित॥२६॥ धन्य कपीची आंगवण। फोडोनियां अंगत्राण। देहींचें चर्म भेदून जाण। मुष्टि दारुण लागली॥२७॥ मुष्टि हाणितां गोळांगुळा[5]। राक्षसहृदयीं निघती ज्वाळा। प्रतापतेजाचा उमाळा। जेंवी अंतराळां[6] महाविजु॥२८॥ ऐसें हनुमंतें आपण। निकुंभ पाडिला जाण। तरी त्यासी न ये मरण। आंगवण सांडीना॥२९॥ हनुमंतें हाणोनि मुष्टिघात। निकुंभ पाडिला मूर्च्छित। पडिला तो जांभया देत। नव्हे प्राणांत तयाचा॥३०॥ पडल्या पडल्या रणाआंत। राक्षस स्वयें भ्रमरहित। होवोनी तो सावचित्त। धरी हनुमंत कवळोनी॥३१॥ निमाला मानूनि निश्चित। हनुमंतें टाकिला उपेक्षित। राक्षस होवोनि सावचित्त। धरी हनुमंत कवळोनी॥३२॥ धरिला मानूनी हनुमंत। उल्हास राक्षससैन्यांत। एक जावोनि लंकेआंत। हरिखें[7] सांगत लंकेशा॥३३॥ बहुतां प्रकारांचा वैरी। हनुमान धरिला युद्धामाझारी। ऐसें सांगतां निशाचरी। दशशिरीं अति धाक॥३४॥ जरी धरिला हनुमंत। तरी त्याचा न करवे घात। जरी आणिला लंकेआंत। करील आकांत राक्षसां॥३५॥ मागें धरिला ब्रह्मपाशीं। तैं न मारवेचि आम्हांसी। मारोनियां राक्षसांसी। जाळून लंकेसी प्रतापें गेला॥३६॥ कपि न धरवे संग्रामांत। ऐसें मानी लंकानाथ। येरीकडे[8] पैं हनुमंत। करी घात निकुंभाचा॥३७॥ निकुंभें धरितां हनुमंतासी। तोही मुष्टि हाणी त्यासीं। मिठीं न सोडून मारुतीसी। पडे तेणेंसीं रणभूमीं॥३८॥ न सुटे निकुंभाची मिठी। हनुमान पडल्या लोटी। चेपितां राक्षसाची घांटी[9]। अति संकटीं सोडिला॥३९॥ स्वयें सोडोनी ऐसियापरी। हनुमान उडोनि अंबरीं। उडी घातली निकुंभावरी। संग्रामगजरीं[10] गर्जोन॥४०॥

शब्दार्थ : १. लोखंडाचा, २. शेषाला, पर्वताला, ३. तारे पडणे, ४. पृथ्वीवर ५. वानराने, ६. आकाशांत, ७. आनंदाने ८. दुसरीकडे, ९. गळा, १०. रणगर्जना करून.

हनूमानुत्पपाताशु निकुंभं मारुतात्मजः। समुत्पत्य च वेगेन निपपातास्य वक्षसि॥५॥
परिगृह्य च बाहुभ्यां परिवृत्य शिरोधराम्। अपातयत्तस्य शिरो भैरवं नदतो महत्॥६॥
अथ निनदति सादिते निकुंभे पवनसुतेन रणे बभूव युद्धम्।
दशरथसुराक्षसेंद्रसूनोर्भृशतरमागतरोषयोः सुभीमम्॥७॥

**हनुमंताकडून निकुंभाचा वध :** हनुमंतें गिरागजरीं। उडी घालोनी निकुंभावरी। दोन्ही बाहु मुरडोनि करीं। शिर नखाग्रीं खुडिलें॥४१॥ छेदोनी निकुंभाचें शिर। रामनामाचा गजर। हनुमंतें केला भुभःकार। गर्जती वानर हरिनामें॥४२॥ हनुमंतें बळानुबंधें[१]। निकुंभ मारिला महायुद्धे। वानर नाचती आनंदें। जयजयशब्दें गर्जोनी॥४३॥

**श्रीरामांचा आवेश :** निकुंभ मारिला पराक्रमें। हें देखोनियां श्रीरामें। कोपा चढला क्षात्रधर्में। पुरुषानुक्रमें बोलत॥४४॥ लहान सहान मारितां येथ। युद्ध नव्हे पैं समस्त। मारावया लंकानाथ। धनुष्या हात घातला॥४५॥ निर्दाळावया रावण। आलें श्रीरामा स्फुरण। बाहु थरकती संपूर्ण। धनुष्यबाण सज्जूनी॥४६॥ रावण मारावया कडाडीं। काढोनि धनुष्याची वोढी[२]। श्रीरामें घालितां उडी। आले तांतडीं[३] त्रिवर्ग॥४७॥ सुग्रीव बिभीषण हनुमंत। तिघीं जणीं श्रीरघुनाथ। निववोनी कोप केला शांत। सभा स्वस्थ बैसली॥४८॥

व्यपेते तु जीवे निकुंभस्य हृष्टा विनेदुः प्लवंगा दिशः सस्वनुश्च।
चचालेव चोर्वी पफालेव साद्यौर्बलं राक्षसांना भयं वा विवेश॥८॥

**निकुंभवधामुळे वानरसैन्यांत जयजयकार :** निकुंभ देखोनी निर्जीव। करोनि रामनामाचा रव[४]। हरिखें नाचती वानर सर्व। केलें अपूर्व हनुमंतें॥४९॥ हनुमंताची आंगवण। देखोनि पृथ्वी कंपायमान। स्वर्गी धाकती सुरगण। भय संपूर्ण राक्षसां॥५०॥ देखोनि हनुमंताची ख्याती। राक्षस चळचळ कांपती। चळीं कांपे लंकापती। रणीं मारुति नाटोपे॥५१॥ विजयाच्या निजगजरीं। वानर गर्जती नामेंकरीं। नाम कोंदलें चराचरी। दशदिशांमाझारीं हरिनाम॥५२॥ निकुंभाच्या बळाची थोरी। ज्यासी कांपिजे सुरासुरीं। तोही मारिला निर्धारीं। क्षणामाझारीं हनुमंतें॥५३॥ हनुमंतें बळें अद्‌भुत। केला निकुंभाचा घात। पुढील कथावृत्तांत। श्रोतां सावध परिसिजे॥५४॥ निकुंभ पडतांचि रणीं। राक्षसां जाली महापळणी। पळोनी गेले लंकाभुवनीं। घायवट[५] रणीं कुंथत॥५५॥

**कुंभ - निकुंभ वधामुळे रावणाला दुःख व मकराक्षाची योजना :** कुंभ निकुंभ दोघे जण। कपींनी मारिले करोनि रण। तें ऐकोनि रावण। दुःख दारुण पावला॥५६॥ आजानुबाहु विशालाक्ष। वीरपुत्र जो कां मकराक्ष। संग्रामीं परम दक्ष। विपक्षपक्षच्छेदक[६]॥५७॥ त्यासी पाचारोनी रावण। गुह्य सांगे स्वयें आपण। रणीं मारावे रामलक्ष्मण। वानरगणसमवेत॥५८॥ धरोनि पुरुषार्थाचें बळ। रामलक्ष्मण माझें शल्य[७]। तें त्वां करावें निःशल्य। वानरदळ दमूनी॥५९॥ पितृघातक मुख्य वैरी। त्यासी तूं साधोनियां मारी। तुझ्या पुरुषार्थाची थोरी। सुरासुरीं कांपिजे॥६०॥ ऐसें बोलोनि दशानन। स्वयें सांडून सिंहासन। मकराक्षासी आपण। गौरवी रावण युद्धार्थी॥६१॥ दिव्य गंध सुमनमाळा[८]। मुकुट कुंडलें कटिमेखळा। अंगत्राण पदक गळां। मुक्ताफळांसमवेत॥६२॥

**मकराक्षाची घोषणा व प्रयाण :** ऐकोनि रावणांचें वचन। शूर अभिमानी खरनंदन। मारोनि रामलक्ष्मण। विशल्य करीन लंकेशा॥६३॥ नमस्कारोनी रावणा। त्यासी करोनि प्रदक्षिणा। मकराक्षें केली गर्जना। शीघ्र रथ आणा सैन्येंसीं॥६४॥ रामलक्ष्मण मनुष्यमात्र। मनुष्य

---

**शब्दार्थ :** १. बळाच्या जोराने, २. दोरी, ३. त्वरेने, ४. ध्वनि, गजर, ५. जखमी, ६. शत्रुपक्षाचा नाशक, ७. दुःख देणारे, ८. पुष्पमाळा.

आमुचा नित्य आहार। वानर ते पालेखाईर। मारीन समग्र रणमारें।।६५।। मकराक्षआज्ञा समर्थ। सैन्येंसीं आणिला रथ। प्रदक्षिणा करोनि तेथ। रथीं बैसत साटोपें।।६६।। स्वयें सारथियासी सांगत। जेथें आहे रघुनाथ। तेथवरी जाऊं दे रथ। संग्रामार्थ तेणेंसीं।।६७।। लहानसहनासी हात। नाहीं घालणें रणाआंत। स्वयें निवटीन[1] रघुनाथ। निश्चितार्थ हा माझा।।६८।। राक्षसांप्रती गर्जोन। मकराक्ष सांगे आपण। रणीं मारावे रामलक्ष्मण। स्वयें रावण मज सांगे।।६९।। आजी रणीं आपण। वधीन रामलक्ष्मण। सुग्रीवातें निर्दळीन। वानरसैन्यसमवेत ।।७०।। मकराक्षाचें सबळ सैन्य। विकट दाढा विक्राळ वदन। एका अंगीं रोम दारुण। जैसे बाण सतेज।।७१।। व्याघ्रमुख तरसमुख। वडवामुख तगरमुख[2]। राक्षससैन्य अनेक। भयानक गडगर्जे।।७२।। मत्त वृषभाऐसे डरकत। मत्त गजाऐसे गडगर्जत। राक्षस मिळाले असंख्यात। मकराक्ष तेथ मुख्य धूर।।७३।। घाव घातला निशाणा। शंख भेरी विकट विराणा[3]। दुंदभि[3] गाजती दणदणां। विक्राळ गर्जना वीरांची।।७४।।

मकराक्षाला अपशकुन : ऐसा वीरांचा गडगजर। चालतां मकराक्षाचा संभार[4]। निष्ठोनी सारथ्याचा कर। आंसूड सत्वर तळीं पडला।।७५।। वीरवीरांची आरोळी। सैन्य चालतां गजदळी। निष्ठोनि सारथ्याकरतळीं। आंसूड तळीं पडों सरला।।७६।। वेगें काढितां आसुंडा। रथातळीं झाला रगडा। अश्व चालतां पुढां। चरणांची उबडा पडती मेटें।।७७।। वारुवांची[5] क्षीण शक्ती। समभूतीं मेटें वळती। अवघे अडखळोनी पडती। खुंटली गती रथाची।।७८।। उठवोनि अश्वसमाज । रथ करूं जाता सज्ज। रथाचा मोडोनि पाडिला ध्वज। जेंवी कां विज लखलखित।।७९।। प्रतिकूळ वायु खवळला बळी। डोळा उघडितां रिघे धूळी । जो तो दोन्ही डोळे चोळी । अश्रूंतें गाळी गजाश्व।।८०।। करीत वाजंत्रांचा गजर। येतां मकराक्षाचा भार। तो देखोनी वानरवीर। युद्धा सत्वर मिसळले।।८१।।

अपशकुनाला उपेक्षून मकराक्षाची पुढे चाल : ऐसे देखोनी अपशकुन। मकराक्ष सांडी उपेक्षून। जेथें उभे रामलक्ष्मण। तेथें आपण शीघ्र आला।।८२।। उडउडों पैं वानर। झांबडती[6] राक्षसभार[7]। तैसेच क्षोभती निशाचर। रणीं वानर मर्दिती।।८३।। रणीं खवळला वेताळ। वानरां निशाचरां प्रबळ। रोमहर्षे[8] युद्ध तुंबळ। हलकल्लोळ राक्षसां।।८४।।

वानरसैन्यावर मकराक्षाचा बाणांचा वर्षाव : शूळ पट्टिश विंधिती बाण। हाणिती शिळा द्रुम पाषाण। फोडोनियां अंगत्राण[9]। धनुष्यबाण मोडिती।।८५।। जैसें दानवांसी सुरवर। रणीं भिडती अति दुर्धर। तैसेचि वानर आणि निशाचर। घोरां दर मांडिलें।।८६।। मोडिले देखोनी निशाचरसैन्य। मकराक्षें वाहोनियां[10] गुण[10]। रणीं त्रासिले वानरगण। सपिच्छ बाण भेदूनी।।८७।।

श्रीरामाचें आश्वासन : सपिच्छीं खडतरतां बाण। रणीं त्रासिले वानरगण। श्रीरामापाशीं अवघे जण। आले पळोन अति भीत।।८८।। श्रीराम कृपाळू संपूर्ण। निवारोनी राक्षसबाण। आश्वासोनि वानरगण। अभयदान दीधलें।।८९।।

वारितान्राक्षसान्दृष्ट्वा मकराक्षो निशाचरः। क्रोधानलसमाविष्टो वचनं चेदमब्रवीत्।।९।।
क्वासौ रामः सुदुर्बुद्धिर्येन मे निहतः पिता। जनस्थानगतः शूरः सानुजः सपरिच्छदः।।१०।।

मकराक्षाची दर्पोक्ती : आश्वासोनी वानरगण। संत्रासितां राक्षससैन्य। तें मकराक्षें देखोन। रागें आपण जल्पत।।९०।। कोण तो राम कैसा येथें। जेणें जिणोनी जनस्थानातें। मारिलें माझिया पितयातें। बंधूसहित ससैन्य।।९१।। ते तुझी संग्रामख्याती। आजी मी आणीन

---

शब्दार्थ : १. मारीन, २. गरासारख्या तोंडाचे, ३. नगारे, ४. सेनासमूह, ५. घोड्यांची, ६. झोंबून लुटू लागले, ७. राक्षसांचे सैन्य, ८. अंगावर रोमांच येतील असे, ९. कवच, १०. दोरी चढवून.

समाप्ती। तुम्ही बापुडीं मनुष्यें किती। माझे शरघातीं उरावया॥९२॥ जनस्थानीं मी नव्हतों तेथें। म्हणोनि पावलेती यशातें। आतां जाणवेल येथें। संग्रामार्थ पुरुषार्थी॥९३॥ पुरुषार्थाचिया प्रौढी। मारीन रामलक्ष्मणजोडी। वानरांची करीन झोडी। तीं तंव बापुडीं वनचरें॥९४॥

अद्यं गंतास्मि वैरस्य पारं ते रजनीचर। सुहृदां चैव सर्वेषां निहतानां रणाजिरे॥११॥
हत्वा रामं सुदुर्बुद्धिं लक्ष्मणं च नराधमम्। तयोः शोणितनिस्यंदैः करिष्ये सलिलक्रियाम्॥१२॥
एवमुक्त्वा महाबाहुर्युद्धेषु रजनीचरः। रथेनांबुदघोषण ययौ रामदिदृक्षया॥१३॥
आहूयमानो बहुभिर्वानरैर्बलशालिभिः। युद्धाय स महातेजा रामादन्यं न चेच्छति॥१४॥

रणीं मारिले माझे पितर। त्या वैराचें परपार। आजि मी पावेन साचार। रामसौमित्र मारुनी॥९५॥ मारोनि दोघे महाबळी। त्यांच्या अशुद्धीची[1] अंजुळी। पितरा देईन तिळांजळी। तेचि काळीं उत्तीर्ण॥९६॥ या दोघांचें घेवोनी रक्त। रणीं मारिले सुहृद आप्त। ते ते तर्पीन समस्त। पितृकार्यार्थी उत्तीर्णत्वें[2]॥९७॥ प्राशावें लक्ष्मणाचें रक्त। ऐसा शूर्पणखेचा मनोरथ। तिचाही पुरवीन अर्थ। दोघे रणांत मारूनी॥९८॥ ऐसा बोलोनी बडिवार[3]। युद्धलागीं खर पुत्र। मेघगडगर्जनें रहंवर[4]। पेलोनि सत्वर संग्रामा आला॥९९॥ वानरवीर अति आवेशीं। मकराक्ष पाचारी युद्धासी। उपेक्षूनि त्यां समस्तांसी। श्रीराम गिंवसीं[5] संग्रामा॥१००॥ श्रीरामावांचून आणिकांसी। नाहीं करणें संग्रामासी। ऐशा करोनी नेमासी। श्रीरामा गिंवसी साटोपें॥१॥ वीर धीर श्रीरघुनाथ। ऐसा पवाडा अति विख्यात। तो कां लपतो वानरांत। संग्रामार्थ निघेना॥२॥ श्रीरामासीं रणकल्लोळ। करावया मकराक्षाचें बळ। डावलोनि[6] वानरदळ। आला तत्काळ संग्राम॥३॥

दृष्ट्वा रामं सुदूरस्थं लक्ष्मणं च महारथम्। सेषुणा पाणिनाहत्य ततो वचनमब्रवीत्॥१५॥
तिष्ठ राम मया सार्धं द्वंद्वयुद्धं प्रयच्छ मे। त्याजयिष्यामि ते प्राणन्धनुर्मुक्तैः शितैः शरैः॥१६॥
यत्तदा दंडकारण्ये पितरं हतवान्मम। दह्यंते भृशमंगानि दुरात्मन्म राघव॥१७॥
दिष्ट्यासि गोचरं राम मम त्वं प्राप्तवानासि। कांक्षितोऽसि क्षुधार्तस्य सिंहस्येवेत्तरो मृगः॥१८॥

ऐसा विचरतां रणाआंत। दूरी देखिला रघुनाथ। तंव मकराक्ष बाणहस्त। असे पाचारीति कराग्रें॥४॥ ऐकें श्रीरामा सावध। मजसीं द्यावें द्वंद्वयुद्ध। आम्हां तुम्हां युद्धसंबंध। इतरीं विनोद पहावा॥५॥ दोघांच्या संग्रामात। जो तिसरा घालील हात। त्याचा तेथेंच करावा घात। हा निश्चितार्थ करावा॥६॥ संगें नको वानरगण। कायसें बापुडें लक्ष्मण। तुजसीं करावें रणांगण। संकल्प पूर्ण हा माझा॥७॥ त्रिशिरा मारिला खर दूषण। त्यां द्वंद्वाचा संताप पूर्ण। तुझा घ्यावया प्राण। रणांगण वांच्छितों॥८॥ हो का माझे अदृष्टपूर्तें। भाग्यें भेटलासी तूं येथें। जेंवी क्षुधिता सिंहातें। भेटती अवचितें लांडगे मृग॥९॥ क्षुद्र मृग सिंहासीं ग्रास। तैसा मी तुझा करीन घांस। कायसा संग्रामविलास। श्रीरामपशु भेटला॥११०॥ जरी असेल आंगवण। तरी मजसीं करावें रण। त्याही युद्धाचें लक्षण। सावधान अवधारीं॥११॥ तूं श्रीराम प्रतापें प्रबळ। मी मकराक्ष संग्रामशीळ। माझा तुझा रणकल्लोळ। लोक सकळ देखत॥१२॥ शस्त्रास्त्रीं धनुष्यबाणीं। शूलमुद्गलगदापाणीं। अथवा मल्लविद्याविंदाणीं। बाहुप्रहरणीं भिडूं दोघे॥१३॥ जें जें अभ्यासिलें रघुपती। मजसीं भिडावें त्वां व्युत्पत्तीं[7]। श्रीरामाची यशःकीर्ती। करीन समाप्ती संग्रामीं॥१४॥ श्रीराम नामें ब्रिदाइत। सकळकुळीं कुळ प्रस्तुत। मज द्यावा द्वंद्वयुद्धार्थ। कळेल पुरुषार्थ दोघांचा॥१५॥ तुझिया पुरुषार्थाची झडती। घेवों आलों मी निश्चितीं। वानरांमाजी लपसी किती। निंद्य युद्धार्थी श्रीरामा॥१६॥

शब्दार्थ : १. रक्ताची, २. उतराई व्हावे म्हणून, ३. मोठेपणा, ४. रथ, ५. शोधू लागला, ६. टाकून सोडून, ७.कौशल्याने.

**श्रीरामांचे प्रत्युत्तर :** ऐकानि मकराक्षाचें वचन। श्रीराम बोले हास्यवदन। ज्याचे ठायीं बहुत जल्पन। आंगवण त्या नाहीं ॥१७॥ महाशूराची नवलगती। युद्धीं करोनी दाविती ख्याती। वृथा जे कां बडबडती। ते तंव निश्चितीं तोंडभांड[1] ॥१८॥ सैरा बडबड करिती भांड। त्यांचे बोल भंडउभंड। तैसेंचि जाण तुझें तोंड। अति वितंड जल्पसी ॥१९॥ बोलाचिया बळावारी । कोणी जिंतिला नाहीं वैरी। तूं तंव निर्लज्ज संसारी। भांडाच्या परी जल्पसी ॥१२०॥ जरी असेल आंगवण। तरी करोनी दावीं रण। बडबडेचें फळ कोण। सीतारमण बोलिला ॥२१॥ नाहीं बळ नाहीं पुरुषार्थ। तोंडभांड जल्पसी येथ। ऐसें बोलतां रघुनाथ। पोळला जीवांत मकराक्ष ॥२२॥ बोलाचिया बळावारी। कोणीं जिंतिला नाहीं वैरी। येणेंही बोलें जिव्हारी। पोळला भारी मकराक्ष ॥२३॥ धनुष्या वाहोनियां गुण। शत सहस्र अमित बाण। श्रीरामावरी क्षोभोन। वर्षे आपण मकराक्ष ॥२४॥ सुवर्णपुंखी मनोहर। रत्नांकित अति गंभीर। मकराक्षाचे तीव्र शर। रामें समग्र छेदिले ॥२५॥ बद्धगोधांगुलित्राण[2]। ज्याघोष[3] तळघोष जाण। तेणें नादें कोंदलें गगन। त्रिभुवन दुमदुमिले ॥२६॥ मकराक्ष आणि श्रीरामचंद्र। युद्धीं मिसळले महाशूर। कौतुक पहावया सुरवर। विमानीं समग्र दाटले ॥२७॥ देव दानव ऋषीश्वर। महोरग[4] नर किन्नर। सिद्ध गंधर्व विद्याधर। विमानीं अंबर कोंदलें ॥२८॥ मकराक्ष वर्षे शर। बाण वर्षे श्रीरामचंद्र। तेणें लोपले रवि चंद्र। दिशा समग्र कोंदल्या ॥२९॥ बाणीं खिळोनि सांडिली धरा। बाणीं खिळियेला वारा। बाणी व्यापिलें अंबरा। दिशा समग्र कोंदल्या ॥३०॥ निशाचर विंधी जे जे शर। ते ते तोडी रामचंद्र। श्रीरामाचे शर दुर्धर। निशाचर स्वयें छेदी ॥३१॥ छेदितां बाणीं बाण। कोपा चढला रघुनंदन। अनिवार शर दारुण। विंधी आपण साटोपें ॥३२॥

ततः क्रुद्धो महाबाहुर्धनुश्चिच्छेद संयुगे । अष्टाभिरथ नाराचैः सूतं विव्याध राघवः ॥१९॥
छित्वा शरै रथं रामो हत्वा चाश्वानपोथयत् विरथो वसुधां प्राप्य मकराक्षो निशाचरः ॥२०॥
अधिकं क्रोधसंरब्धः शूलं जग्राह पाणिना। त्रासयन्सर्वभूतानां युगांताग्निसमप्रभम् ॥२१॥
विभ्राम्याथ च तच्छूलं प्रज्वलंतं निशाचरः। क्रोधाश्च प्राहिणोत्तस्मै राघवाय महात्मने ॥२२॥

**श्रीरामांनी मकराक्षाचे रथ अश्व, सारथी यांचा संहार केला :** मकराक्षें आपण। निवारितां बाणें बाण। श्रीरामें धनुष्य छेदोनी आपण। पाडिलें जाण क्षितितळीं[5] ॥३३॥ सर्वेंचि विंधोनियां बाण। सारथ्याचा घेतला प्राण। चारी वारु मारिले जाण। श्रीरामें क्षोभोन संग्रामीं ॥३४॥ हताश्व हतसारथी। मकराक्ष जाला विरथी। सक्रोध शूळ घेवोनी हातीं। श्रीरामाप्रती धांविन्नला ॥३५॥ मकराक्षाचे निर्वाणभल्ल[6]। शूळ हस्तीं वरद शूळ। धगधगीत अति प्रबळ। अग्निकल्लोळतेजस्वी ॥३६॥ जेंवी कां भूतांसी घातक। दंडहस्तें धांवें अंतक। तेंवी शूळहस्तें मकराक्ष। रामासंमुख धांविन्नला ॥३७॥ ज्वाळा निघती नेत्रद्वारा। दांत खातसे करकरां। शूळ परजोनी[7] गरगरां। श्रीरामचंद्रा हाणितला ॥३८॥ शूळ येतांचि कडाडीं। सर्व भूतां पडे झांपडी। स्वर्गी सुरवरें झालीं वेडीं। रामें निर्वडीं विंधिला ॥३९॥

आपततें ज्वलंतं तु खरपुत्रकराच्च्युतम्। बाणैश्चतुर्भिराकाशे शूलं चिच्छेद राघवः ॥२३॥
स च्छिन्नो बहुधा शूलो दिव्यहाठकचित्रितः। व्यशीर्यत महोल्केव रामबाणार्दितो भुवि ॥२४॥
तं दृष्ट्वा विफलं शूलं मकराक्षो निशाचरः। मुष्टिमाधाय काकुत्स्थं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् ॥२५॥
स तं दृष्ट्वा पतंतं तु प्रहस्य रघुनंदनः। पावकास्त्रं ततो रामः संदधे स्वशरासने ॥२६॥
तेनास्त्रेण हतं रक्षः श्रीरामेण महात्मना। संभिन्नहृदयस्तत्र पपात च ममार च ॥२७॥

---

**शब्दार्थ :** १. नुसती बडबड करणारे, २. हाताला घट्टा पडावा म्हणून बोटांवर आच्छादन घालून, ३. धनुष्याच्या दोरीचा टणस्कार, ४. मोठे सर्प, ५. पृथ्वीर, ६. भल्ल = भाले, ७. फिरवून, पेलून.

मकराक्षाचा वध: शूळ येतां धगधगित। राम रणयोद्धा सावचित्त। तीं बाणीं आकाशांत। छेदूनि निश्चित पाडिला॥१४०॥ शिववरद शूळशक्ती। श्रीराम शिवाची ध्येयमूर्ती। देखोनि पळाली ते परती। शूळ या युक्तीं छेदिला॥४१॥ बाप धनुर्वाडा श्रीरघुनाथ। जैसा गगनीं उल्कापात[1]। तैसा शूळ धगधगित। रणाआंत पाडिला॥४२॥ शूळ जातांचि निष्फळ। मकराक्ष करी तळमळ। श्रीरामासीं न चले बळ। सिद्धि[2] सळ[3] न पवेचि[3]॥४३॥ म्हणे श्रीरामा राहें राहें। माझा मुष्टिघाय साहें साहें। म्हणूनि उभवोनी[4] बाहे[5]। आला लवलाहें राक्षस॥४४॥ मकराक्ष येतां दारुण। श्रीरामें सज्जिला अग्निबाण। हृदयीं विंधितांचि जाण। पडे निष्प्राण क्षितितळीं॥४५॥ बोंब सुटली राक्षसदळीं। वानरीं पिटिली टाळी। मकराक्ष महाबळी। रामें तत्काळीं मारिला॥४६॥

दृष्ट्वा ते राक्षसाः सर्वे मकराक्षस्य पातनम्। लंकामेव प्रधावंति रामबाणभयार्दिताः॥२८॥

राक्षस-सेनेचे लंकेत पलायन: श्रीरामें निमिषार्धांत्। मकराक्षाचा केला घात। राक्षससेना भयभीत। लंकेआंत पळाली॥४७॥ दुर्धर मारिला निशाचर। विजयी जाला श्रीरघुवीर। वानर करिती जयजयकार। श्रीरामचंद्र निजविजयी॥४८॥ एका जनार्दना शरण। झालें मकराक्षाचें निर्दळण। पुढील गोड निरूपण। रामायण अति रम्य॥१४९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां मकराक्षवधो नाम पंचत्रिंशत्तमोऽध्यायः॥३५॥ ओंव्या॥१४९॥ श्लोक॥ २८॥ एवं॥१७७॥

# अध्याय छत्तिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## मायावी सीतेचा इंद्रजिताकडून वध

करोनि मकराक्षाचा घात। विजयी बैसला श्रीरघुनाथ। येरीकडे इंद्रजित। क्रोधान्वित तळमळी ॥१॥

निहतं मकराक्षं तं दृष्ट्वा रामेण संयुगे। शक्रजित्सुमहाक्रुद्धो विवेश रणसंकटम् ॥१॥

**इंद्रजिताला चिंता :** मकराक्ष मारिला महाकपटी। तें देखोनियां दृष्टीं। इंद्रजित पडिला रणसंकटीं। त्याची गोष्टी अनुवादे ॥२॥ मारिले भरंवशाचे वीर। जे कां निधडे महाशूर। त्यांसी मारिती वानर। पालेखाइर पशुदेही ॥३॥ मारिला कुंभकर्ण महावीर। देवांतक निरांतक त्रिशिर। वधिला अतिकाय दुर्धर। महोदर महापार्श्व ॥४॥ प्रहस्त पावला रणीं मरण। कुंभ निकुंभ दोघे जण। मकराक्षाचा घेतला प्राण। विंधोन बाण श्रीरामें ॥५॥ भरंवशाचे वीर दारुण। ते ते पावले रणीं मरण। आलें राक्षसांचें निधन[६]। काय आपण करावें ॥६॥ राखावया मकराक्षाची पाठी। मज धाडी दशकंठी। ते गोष्टी जाली उफराटी। तोही शेवटीं मारिला ॥७॥ शिणोन मारावे वानर। श्रीरामतीर्थें ते वनचर। अवघे उठती पालेखाइर। अति दुर्धर रणयोद्धे ॥८॥ मारिल्या राक्षसांच्या कोडी। न दिसती वानरांच्या करवडी[७]। हे श्रीरामाची कृपा गाढी[८]। प्राणांतपाडीं संरक्षी ॥९॥ रामलक्ष्मण महाशूर। तैसेच निधडे वानर। आतुर्बळी हनुमान वीर। अति दुर्धर सर्वार्थी ॥१०॥ त्यासीं न चले आंगवण। काय करावें आपण। बळें करूं जातां रण। माझाही प्राण घेतील ॥११॥ यांसीं न चले पैं वरदार्थ। रावणपापें वरद व्यर्थ। आला राक्षसांसी अंत। रणी रघुनाथ क्षोभला ॥१२॥ परतोनि जातां लंकेआंत। मज

---

**शब्दार्थ :** १.तारे पडणे, २. मंत्रादिक सिद्धी, ३. उपयोगी पडली नाही, ४. उभारून ५.बाहू, ६. शेवट, ७. प्रेतें, ८. मोठी.

कोपेल लंकानाथ। इंद्रजित चिंताक्रांत। असे चिंतित उपावो ॥१३॥ राम लक्ष्मण हनुमंत। अंगद सुग्रीव जांबवंत। अवघियांचा होईल घात। तो कार्यार्थ साधीन ॥१४॥

मेघनादस्तदा दृष्ट्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ। रणायाभ्युद्यतौ वीरौ जुहुवे पावकं तदा ॥२॥
ततो रथमवस्थाप्य रावणी राक्षसैर्वृतः। सीतां मायामयीं कृत्वा तस्या वधमरोचयत् ॥३॥
सर्वेषां मोहनार्थाय बुद्धिं कृत्वा सुदुर्मतिः। हंतुं सीतां व्यवसितो वानराभिमुखो ययौ ॥४॥

इंद्रजिताची मायिक सीतेच्या वधाची कल्पना : श्रीराम आणि लक्ष्मण। दोघे उद्यत करावया रण। देखोनि इंद्रजित आपण। अभिचारयज्ञ[1] आरंभी ॥१५॥ इंद्रजित सदा कपटानुवृत्ती। स्वप्नीही नाहीं सुमती। मावेची[2] करोनि सीता सती। रणानुवृत्तीं मारीन ॥१६॥ देखतांचि सीतेचें मरण। तत्काळ अवघे त्यजिती प्राण। श्रीराम आणि लक्ष्मण। वानरगण समस्त ॥१७॥ मायिक सीतेचें दर्शन। तेंचि अवघ्यां परम मरण। ऐसें मानोनि दुर्जन। सीतार्थीं हवन आरंभी ॥१८॥ ऐसिया हर्षाचिया स्थितीं। अभिचारहोम मंत्रोक्तीं। करितां न करवे सीता सती। न ये अभिव्यक्ती आकार ॥१९॥ सीता नाकळे होमद्वारा। सीता नाकळे मंत्रतंतां। सीता नाकळे अभिचारा। निशाचरा अति चिंता ॥२०॥ जारण मारण उच्चाटण। मोहन अथवा स्तंभन। यांसी सीता नाकळे जाण। निर्बंधन श्रीरामें ॥२१॥ करितां श्रीरामनामस्मरण। पळे जारण मारण उच्चाटन। सीता चिच्छक्ति[3] आपण। मायाबंधन बाधेना ॥२२॥ सबळबळें अंधकार। नव्हे सूर्यासी गोचर। तैसा मायिक वेव्हार। सीतेसमोर होऊं न शके ॥२३॥ मायिक न करवे सीता। इंद्रजितासीं परम चिंता। मारावया रघुनाथा। काय म्यां आतां करावें ॥२४॥ शिववरद मज त्रिशुद्धी[4]। आभिचारिका करितां सिद्धी। आजिंचा सुनाट[5] गेला विधी। पुसों बुद्धी सदाशिवा ॥२५॥ इंद्रजित शिवसभेसीं। स्वयें रडे उकसाबुकसीं। मिथ्यात्व आलें तुझ्या वरदासीं। कोणापासीं मी सांगूं ॥२६॥ मायिक सीता यावया हाता। तुझ्या वरदोक्तें होम करितां। प्राप्त नव्हेचि सती सीता। आली मिथ्यता वरदासी ॥२७॥ मायातीत श्रीराम सीता। तिशीं न चले अभिचारता। मायिक सीता न ये हाता। शिव सत्यता स्वयें वदला ॥२८॥ ऐकोनि शिवाचें वचन। इंद्रजित करी रुदन। सीता न पावतां जाण। समाधान मज नव्हे ॥२९॥ दृढ धरितां शिवाचे चरण। शिव बोलिला आपण। मायिक सीतेलागीं जाण। पार्वतीलागोन प्रार्थावें ॥३०॥ छळावया रघुनाथा। पार्वती झाली मायिक सीता। तिचेनि वरदानें तत्वतां। मायिक सीता पावसी ॥३१॥

इंद्रजिताला पार्वतीचे उत्तर व मायिक सीता- मूर्तीसह इंद्रजिताचे आगमन : इंद्रजित पार्वती प्रार्थितां। ते म्हणे म्यां छळावया रघुनाथा। मायिक जालें होतें सीता। तिच्याही घाता शिव चिंती ॥३२॥ पुढिलांचें करितां छळण। जो छळी तो पावे मरण। इंद्रजित मरावया जाण। मागे आपण मायिक सीता ॥३३॥ पार्वती म्हणे इंद्रजिता। विनवोनियां विश्वनाथा। मायिक मागतोसी सीता। मरणावस्था तुज आली ॥३४॥ मायिक न करवे श्रीरामकांता। मायिक न करवे गा सीता। माया न चले श्रीरघुनाथा। मायामर्दिता[6] श्रीराम ॥३५॥ मायिक सीतेच्या स्वरूपता। मी छाया छाडीन तत्वतां। तिच्या करितांचि घाता। इंद्रजिता मरशील ॥३६॥ कां मागसी मायिक सीता। अशोकवनीं आहे सीता। जाऊनि करीं तिच्या घाता। मग पुरुषार्थ कळेल ॥३७॥ मारितां अशोवनाआंत। सीता करील भस्मांत। ऐकोनि उमा[7] हांसत। धिक् पुरुषार्थ कपटत्वें ॥३८॥ मायिक सीतेचें मागणें। तूं बैसलासी मरणा धरणें। उमा क्षोभेंकरून म्हणे। जीवें प्राणें मरशील ॥३९॥ इंद्रजित म्हणे आपण। मज सर्वथा न ये मरण। निजमरणाचें लक्षण। स्वयें आपण अनुवादे ॥४०॥ बारा वर्षे निराहारी। जो कां

शब्दार्थ : १.जारणमारणाचा होम, २. खोटी, ३. ज्ञानशक्ती, ४. खरोखर. ५. व्यर्थ, ६. मायेचा नाश करणारा, ७. पार्वती.

बाळब्रह्मचारी। ऐसा पुरुष नाहीं संसारीं। मी कैसेपरी मरेन।॥४१॥ ऐसें मानूनि निश्चयेंसीं। इंद्रजित येवोनी सैन्येंसी। मायिक सीतेच्या मूर्तीसी। गडगर्जेसीं काढिली॥४२॥ दडदडां निशाणघोषीं। शंख भेरी गडगर्जेसी। सीता आणितां युद्धापासीं। वानरीं तिसीं देखिलें॥४३॥ जे कां पार्वतीवरदत्त। मायिक सीता रथीं रथस्थ। राक्षससेनापरिवारयुक्त। आणिली वधार्थ संग्रामा॥४४॥

शंकर वायूला मायिक सीतेचे रहस्य मारुतीला कळविण्यास सांगतात : शिव सांगे वायूपासीं। गुह्य सांगावें हनुमंतासी। मारितां मायिक सीतेसी। कैवारासी न करावें॥४५॥ देखतां सीतेचिया घाता। हनुमान करील अति अनर्था। मारोनि राक्षसां समस्तां। स्वयें सीता सोडवील॥४६॥ वाल्मीकभाष्य अनागत[१]। सिद्धी पावावें समस्त। पार्वतीचा वरदार्थ तोही गुह्यार्थ पाळावा॥४७॥ ऐकोनि वायूचा वचनार्थ। शिववाक्य वंदी हनुमंत। पार्वतीचा वरदार्थ। प्रतिपाळित मारुति॥४८॥ करावया सीतेच्या घाता। रथीं[२] वाहूनि[२] मायिक सीता। इंद्रजित होय आणिता। कपी देखती संग्रामीं॥४९॥

एकवेणीधरां सीतां रक्षोहरणकर्शिताम्। परिक्लिष्टैकवसनां मलिनां हतमंडनाम्॥५॥
रथरेणुसमादिग्धां भीषरूपां वराननाम्। रजोमलाभ्यामालिप्तैः सर्वगात्रैरवेक्षिताम्॥६॥
ददर्श हनुमांस्तत्र सपंकामिव पद्मिनीम् । स मुहूर्तमिव ध्यात्वा सीतेयमिति वानरः॥७॥
बभूव चिरदृष्टा हि तेन सा जनकात्मजा॥८॥

इंद्रजिताच्या रथावरी। मायिकसीतासौभाग्यथोरी। भासतसे कवण्यापरी। जेंवी कां खरी जानकी॥५०॥ माथांचिया केशश्रेणी। जटाबंधन वळी वेणी। एकवस्त्र शय्या धरणी। दीनवदन जानकी॥५१॥ न घे आस्तरण[३] प्रावरण[४]। न घे अभ्यंगमर्दन। तेणें सर्वांग पैं जाण। दिसे संपूर्ण मलदिग्ध॥५२॥ न घे मंडण भूषण। न घे सुमन चंदन। न घे तृषार्थ जीवन। श्रीरामध्याननिष्ठ॥५३॥ राक्षसीं आणितां रणांआंत। स्त्रीस्वभावें भयभीत। रथरजेरेणूंनी सर्वांग व्याप्त। दिसे भयभीत जानकी॥५४॥ सीता देखोनि हनुमंत। सांडोनियां निजपुरुषार्थ। शिववाक्यें पैं ध्यानस्त। दिसे तटस्थ पैं राहिला॥५५॥

तां दीनां मलदिग्धांगीं रथस्थां प्रेक्ष्य जानकीम्। बाष्पपर्याकुलमुखो हनुमान्व्यथितोऽभवत्॥९॥
कृत्वा विकोशं निस्त्रिंशं प्रजहास महास्वनः। तां प्रगृह्य स केशेषु रावणिर्जनकात्मजाम्॥१०॥
क्रोशंती राम रामेति कृत्वा मायामयीं तदा। खड्गरत्नमसिं गृह्य केशपक्षे परामृशत्॥११॥

इंद्रजिताची गर्जना व सीतेचा आक्रोश : इंद्रजितहस्तगत। रथीं जानकी आक्रंदत। तीतें देखोनि हनुमंत। अश्रु स्रवत अति दुःखें॥५६॥ सीतासतीचें हनन। हनुमंत स्वयें देखोन। अश्रुधारा स्रवती नयन। करी रुदन अति दुःखे॥५७॥ देखोनि सीतेचा पैं घात। हनुमान करील अति अनर्थ। होता इंद्रजित धाकत। तेणें तो रडत देखिला॥५८॥ रडतां देखोनि हनुमंता। केशीं धरोनियां सीता। इंद्रजित साटोपें गर्जता। इसी मी आतां मारीन॥५९॥ हें तंव मुख्य अवलक्षण। इचे अंगी अशुभ चिन्ह। इचें करितां पाणिग्रहण[५]। रघुनंदन अति दुःखी॥६०॥ इच्या लग्नाचे माझारीं। परशुरामेंसी जुंझारी[६]। पडली श्रीरामाचिये शिरीं। भाग्यकरीं[७] वाचला॥६१॥ हे तंव समूळ करंटी। बैसोनि श्रीरामाचे पाटीं। अयोध्ये येतां उठाउठीं। घातला दिग्पटीं श्रीराम॥६२॥ वना काढितां श्रीरघुनाथा। जीवें मारिलें दशरथा। मुख्य मूळ हे अनर्था। दुःखावस्था इचेनि॥६३॥ करितां सीतेचें वरण। गेलें राज्याचें मंडण। सेवेलागोनि आपण। वनोवन हिंडवी॥६४॥ हिंडवितां वनोवन। नाहीं अन्न रसपान। तृणशय्येचें शयन। अवलक्षण जानकी ही॥६५॥ सीता निखळ दुःखराशी। दुःख करावया

शब्दार्थ : १. न आलेले, पुढे होणारे, २. रथात घालून, ३. आंथरुण, ४. पांघरूण, ५. विवाह, ६. लढाई, ७. सुदैवाने.

श्रीरामासी। स्वयें आली वनवासासी। दु:ख बहुतांसी दीधलें ॥६६॥ विराधें धरिलें वाटे येतां। दु:खी केला निजभर्ता। विराधें मारावें रघुनाथा। तोचि अवचिता निमाला ॥६७॥ सीता स्वरूपें निखळ पाप। सखा लक्ष्मण नित्य निष्पाप। त्यावरी घातला अभिशाप[1]। दु:खरूप जानकी ॥६८॥ सांगे अतिअनर्थी सीता। सुखें पंचवटीं असतां। मृगामार्गे धाडोनि भर्ता। दु:खावस्था तिघांसी ॥६९॥ इचें देखतांचि मुख। लंकेशासी लागली भीक। इचे अभिलाषें दशमुख। परम दु:ख पावला ॥७०॥ इसी आणितां लंकेआंत। लंका जळाली समस्त। कुमरवीरकुंभकर्णांत। महोदर प्रहस्त निमाले ॥७१॥

मायावी सीतेचा इंद्रजिताकडून शिरच्छेद : हे दु:खदायक महाआगी। हे सुहृदबंधुसंगभंगी[2]। हे मी मारीन रणरंगी। खड्ग सवेगीं उचलिलें ॥७२॥ काढोनि कोशाबाहेरां। पुसोनियां खड्गधारा। मारावया सीता सुंदरा। निशाचरा आवेश ॥७३॥ पुरुषाचे समुष्टी हस्त। ते षड्रत्ती खड्ग[3] खचित। तेणें खड्गेंसीं इंद्रजित। सीतेचा घात करूं आला ॥७४॥ रामनामें आक्रंदती। केशकलाप धरोनि हाती। मारावया सीता सती। क्रोधानुवृत्ती इंद्रजित ॥७५॥

गृहीतां तां तदा दृष्ट्वा हनूमान्दैन्यमागतः। दुःखजं वारि नेत्राभ्यामसृजत्पवनात्मजः ॥१२॥

शिवाज्ञा सांगे वायुपिता। मिथ्या मायामय सीता। इंद्रजित करितां घाता। तूं सर्वथा भिऊं नको ॥७६॥ जन्ममरणातीत[4] सीता। तिच्या कोण करील घाता। सीता मायिक मारितां। तूं अनर्था करूं नको ॥७७॥ मानून शिवाचें वचन। देखोनि सीतेचें हनन। हनुमान मिथ्या करी रुदन। मायिक लक्षण जाणूनी ॥७८॥ देखतां सीतेचिया घाता। हनुमान करिता अति आकांता। मारिता इंद्रजिता लंकानाथा। आणि समस्तां राक्षसां ॥७९॥ जाणोनि मायिक सीताज्ञान। पाळून शिवाचें वचन। हनुमान मिथ्या करी रुदन। स्रवती नयन अश्रुधारा ॥८०॥ मुख्य शिवाचें वचन। सांगोनि गेला पिता पवन। तें तें हनुमंतें पाळून। मिथ्या रुदन करितसे ॥८१॥

षरिवार्य हनूमंतं प्रत्युवाचेंद्रजित्तदा। सुग्रीवस्त्वं च रामश्च यन्निमित्तमिहागताः ॥१३॥
तां हनिष्यामि वैदेहीमद्यैव तव पश्यतः। इमां हत्वा ततो रामं लक्ष्मणं त्वां च वानर ॥१४॥
सुग्रीवं च हनिष्यामि तं चानार्यं बिभीषणम्। तमेवमुक्त्वा रुदतीं सीतां मायामयीं ततः ॥१५॥
शितधारेण खड्गेन निजघानेंद्रजित्स्वयम्। यज्ञोपवीतमार्गेण छिन्ना तेन तपस्विनी ॥१६॥

मारितां देखोनियां सीता। हनुमान करील अति आकांता। ऐसा इंद्रजित धाकत होता। तों कपि रडतां देखिला ॥८२॥ रडतां देखोनि हनुमंत। इंद्रजित जाला उल्लसित। रणरंगी स्वयें गर्जत। निजपुरुषार्थ अनुवादे[5] ॥८३॥ सीता सोडवणें हेत। शिळीं बांधोनियां सेत। लंके आला श्रीरघुनाथ। सुग्रीवयुक्त ससैन्य ॥८४॥ ते हे जनकदुहिता। सीता ओळख तूं हनुमंता। इच्या करितों मी घाता। तुज देखतां संग्रामीं ॥८५॥ इसी मारितां जाण। आधीं तुझा घेईन प्राण। वृथा करूं नको रुदन। आलें निधान हनुमंता ॥८६॥ आधीं तुझा घेवोनि प्राण। मग मारीन रामलक्ष्मण। अंगद सुग्रीव राजे जाण। वानरगण वधीन ॥८७॥ बिभीषण आमचा चुलता। परी पेटला आमच्या घाता। कैंचें साधुत्व त्याचें माथां। तोही मी आतां मारीन ॥८८॥ हनुमंतासी निर्भर्त्सून। इंद्रजित करितां गर्जन। शिववाक्य प्रतिपाळून। धरिलें मौन हनुमंतें ॥८९॥ इंद्रजित मारितां मायिक सीता। तुवां न करावें पुरुषार्था। सांगोनि गेला पवन पिता। तेंही तत्वतां प्रतिपाळी ॥९०॥ निवांत देखोनि हनुमंत। तंव तंव इंद्रजित गर्जत। मायिक

**शब्दार्थ :** १. अपवाद, दोषारोप, २. सुहृद, बंधु इत्यादिकांचा विरह उत्पन्न करणारी, ३. तरवार, ४. जन्ममरणावेगळी, ५. बोले.

सीतेचा करावया घात। खड्गा हात घातला॥९१॥ सीता रडत पडत। रामनामें आक्रंदत। तिचे झोंटीस[1] घालोनि हात। खड्ग तुळित[2] इंद्रजित॥९२॥ मायिक सीतावधद्वारा[3]। अति उल्लास निशाचरा। अश्मनिशितखड्गधारा[4]। सीतेच्या शिरा छेदिलें॥९३॥ द्विज घालिती यज्ञोपवीत। तैसा करितां शस्त्रघात। मायिक सीतेचे पैं प्रेत। न दिसे व्यक्त रणरंगी॥९४॥ नाहीं रथावरी शिर। नाहीं धरेवरी शरीर। अवघे झालें निराकार। आश्चर्य थोर सुरसिद्धां॥९५॥ मारितां दोराच्या सर्पासी। तळीं प्रेतत्व नाहीं त्यासी। तेंवी मायिक सीतेसी। नाहीं देहासीं देहत्व॥९६॥ मायिक सीता प्रेतमूर्ती। नाहीं रथीं ना क्षितीं[5]। देखोनि इंद्रजित निजचित्तीं। भयभ्रांती पावला॥९७॥

आकाशवाणी : तंव तेथें आकाशांत। शब्द उठिला भयभीत। रिघों न शकसी लंकेआंत। होईल प्राणांत संग्रामीं॥९८॥ जितकें तुवां केलें कपट। आतां त्याचा आला शेवट। सौमित्र छेदील तुझा कंठ। रणीं यथेष्ट भिडोनी॥९९॥

हनुमंताने क्रोधाने इंद्रजितावर शिळा फेकली : मारितां मायिक सीता। कोंप आला हनुमंता। करावया इंद्रजिताच्या घाता। होय उचलिता महाशिळा॥१००॥

स तु शोकेन चाविष्टः कोपेन च महाकपिः। हनूमान्राक्षसरथे पातयामास वै शिलाम्॥१७॥
भीमां पतंतीं दृष्ट्वा तु रथः सारथिना सह। विवेश धरणीं भित्वा सा शिला व्यर्थतां गता॥१८॥
पतितायां शिलायां तु रक्षसां व्यथिता चमूः। तामध्यगच्छन्शतशो नंदतः काननौकसः॥१९॥
वृक्षशैलशिलावर्षं विसृजंतः प्लवंगमाः। शत्रूणशं कदनं चक्रुर्नेदुश्च विविधैः स्वनैः॥२०॥

इंद्रजित हतबल होऊन बिळात लपतो : घालावया इंद्रजिताच्या कपाळा। कोपें हनुमंतें सोडिली शिळा। इंद्राजिताने देखोनि डोळां। बाणजाळा वर्षत॥१॥ विंधितां कोटि कोटि बाण। शिळा न फुटे अति दारुण। विंधितांही वज्रबाण। अणुप्रमाण भंगेना॥२॥ ऐसें देखोनियां डोळां। उघडोनियां तेथींचिया बिळा। इंद्रजित रथेंसीं सगळा। स्वयें पळाला त्यामाजी॥३॥ चुकला इंद्रजिताचा घात। शिळा पडतां सैन्याआंत। अवघ्यां एकचि जाला घात। जाला प्राणांत शिळातळीं॥४॥ शिळातळीं राक्षससंभार। मारितां देखोनि वानर। आले गर्जत अपार। शिळाशिखर तरुहस्ती॥५॥ एक मारिती शिळाशिखरी । एक मारिती तरुवरीं। राक्षससैन्यासी बोहरी[6]। करूं वानरीं आदरिली॥६॥ इंद्रजित अडकला बिळाआंत। राखण बैसला हनुमंत। बाहेर निघतां करील घात। तेणे धाकत इंद्रजित॥७॥ येरीकडे[7] वानरभारीं। बोंब सुटली एकसरीं। इंद्रजिताने खड्गधारीं। सीतासुंदरी मारिली॥८॥ ऐसी ऐकतांचि मात। धाकिन्नला हनुमंत। सीताविरहें श्रीरघुनाथ। झणीं प्राणांत करील॥९॥ बिळीं सोडोनि इंद्रजितासी। हनुमान आला वानरसेनेसीं[8]। निवारी त्यांच्या युद्धासी। श्रीरामापासीं यावया॥११०॥

यन्निमित्तं च युध्यामः सा हता जनकात्मजा। इममर्थं च विज्ञाप्य रामं सुग्रीवमेव च॥२१॥
तौ यत्प्रतिविधास्येते तत्करिष्यामहे वयम्। शनैः शनैरसंभ्रांतः सबलः संन्यवर्तत॥२२॥
ततः प्रेक्ष्य हनूमंतं व्रजंतं यत्र राघवौ॥२३॥

हनुमंताकडून श्रीरामांना इंद्रजितकृत्य कथन : जिनिमित्त युद्ध करणें। ती सीता मारिली इंद्रजितानें। हा वृत्तांत सांगावयाकारणें। शीघ्र जाणें श्रीरामापासीं॥११॥ आम्हां मुख्य श्रीरामचंद्र। सुग्रीव आमचा राजेंद्र। सीतावधाचा विचार। सांगो समग्र त्यांपासीं॥१२॥ ते तंव विचारचक्रवर्ती। कैसा काय विचार करिती। विचार करोनि जें सांगती। तेंचि निश्चिती

शब्दार्थ : १. केशांस, २. परजीत, ३. सीतेचा वध केल्याने, ४. सहाणेवर घासलेल्या खड्गाच्या धारेने, ५. जमिनीवर, ६. नाश, ७. दुसऱ्या बाजूला, ८. वानरसैन्यासह.

करूं आम्ही ॥१३॥ इंद्रजितानें मारिली सीता। सत्य न माने श्रीरघुनाथा। जन्ममरणाची कथा। सीतेंसीं सर्वथा असेना ॥१४॥ युद्धापासूनि वानर। शनैः शनैः काढोनि समग्र। पुढें होवोनि हनुमान वीर। आले सत्वर रामापासीं ॥१५॥ पाळोनियां शिववरदान। हनुमान आला करीत रुदन। तें देखोनि रघुनंदन। पावली खूण वरदाची ॥१६॥ इंद्रजितानें मारिली सीता। ऐसें हनुमंतें सांगतां। मिथ्या कळोनि तत्वतां। आली रघुनाथा महामूर्च्छा ॥१७॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा रामो दुःखेन मूर्च्छितः। निपपात तदा भूमौ कृत्तमूल इव द्रुमः ॥२४॥

लक्ष्मणस्तं तु बाहुभ्यां परिष्वज्य सुदुःखितः। उवाच राममस्वस्थं वाक्यं हेत्वर्थसंयुतम् ॥२५॥

राममाश्वासयामास लक्ष्मणो भ्रातृवत्सलः। अवेक्ष्य गुल्मान्सकलांस्ततः प्राप्तो बिभीषणः ॥२६॥

**श्रीरामांना शोक व मूर्च्छा :** मायिक सीता मायिक वार्ता। मिथ्या जाणोनि तिच्या घाता। मूर्च्छा आली श्रीरघुनाथा। शिववरदार्था पाळावया ॥१८॥ गंगातीरींचा तरुवर। उन्मळोनि पडे थोर। तैसा पडिला रघुवीर। दुःख दुर्धर सीतेचें ॥१९॥ श्रीराम मूर्च्छित पडतां। लक्ष्मणासी दुःखावस्था। आलिंगोनि बंधुवत्सलता[१]। अंकी भ्राता निजवी ॥१२०॥ अंगी वाहोनि श्रीरघुनाथा । स्वयें लक्ष्मण होय बोलता। इंद्रजितानें मारिली सीता। उपाय आतां दिसेना ॥२१॥ महापाप मारणें सीता। तेणें सुखरूपता इंद्रजिता। आम्ही वर्ततों स्वधर्मता। दुःखावस्था आम्हांसी ॥२२॥ धर्माधर्मविवंचना। न कळे सहसा अज्ञाना। येतां श्रीरामा मूर्च्छना । अति वेदना वानरां ॥२३॥ वानर मिळोनियां सकळ। नीलोत्पलीं[२] सुगंध जळ। शिंपितां श्रीराममुखकमळ। झाला अळुमाळ[३] सावध ॥२४॥ हनुमंताचिया समता। पाळावया शिववरदार्था। अत्यंत मूर्च्छा श्रीरघुनाथा। आली विकळता[४] सर्वांगीं ॥२५॥ ऐसें देखोनि श्रीरघुनाथा। लक्ष्मणासीं दुःखावस्था। इंद्रजितानें मारिल्या सीता। राम सर्वथा वांचेना ॥२६॥ श्रीरामें सोडितांचि प्राण। आम्हां अवघ्यातेंचि मरण। दुःखे मरतील भरत शत्रुघ्न। सांडितील प्राण तिघी माता ॥२७॥ निमालिया रघुनंदन। निमतील अयोध्येचे जन। किष्किंधे निमतील वानरगण। प्रळय पूर्ण पैं आला ॥२८॥ जातांच शरीराचा प्राण। खुंटे इंद्रियांचें चळण। तेंवी निमाल्या रघुनंदन। आम्हीही जाण निमालों ॥२९॥ देहींहून जातां आत्मा। प्रेतरूप राहे प्रतिमा। तैसेंच होय गा आम्हां। स्वयें श्रीराम मरतांचि ॥१३०॥ श्रीराम जीव आम्ही देहवंते। श्रीराम आत्मा आम्ही भूतें। श्रीराम चैतन्य[५] आम्ही चित्तें। अन्यथा येथें असेना ॥३१॥ करोनि सीतेचा निजघात। साधिला इंद्रजितानें पुरुषार्थ। आमुचा विध्वंसोनि स्वार्थ। अति आकांत ओढवला ॥३२॥ इंद्रजितानें मारिली सीता। कांही उपाय न चले सर्वथा। केंवी वांचवे रघुनाथा। परम चिंता अवघ्यांही ॥३३॥ श्रीरामाचें हृद्गत। स्वयें जाणे हनुमंत। हनुमंताचें मनोगत। श्रीरघुनाथ स्वयें जाणे ॥३४॥ लक्ष्मणासी करितां रुदन। वानर अवघे चिंतामग्न। मिथ्या सीतेचें हनन। आला शोधून बिभीषण ॥३५॥ दूत धाडोनि लंकेआंत। अशोकवनीं सीता स्वस्थ। इतुका घेवोनि वृत्तांत। आला त्वरित बिभीषण ॥३६॥ तंव वानरकटकांत[६]। वर्तताहे अति आकांत। ऐकोनि सीतेचा मरणार्थ। श्रीरघुनाथ मूर्च्छित ॥३७॥

ददर्श मोहमापन्नं लक्ष्मणस्यांकमाश्रितम्। व्रीडितं शोकसंतप्तं प्रेक्ष्य रामं बिभीषणः ॥२७॥

अंतर्दुःखेन दीनात्मा किमेतदिति सोऽब्रवीत्। उवाच लक्ष्मणो वाक्यमिदमश्रुपरिप्लुतः ॥२८॥

हतामिंद्रजिता सीतां सम्यक् श्रुत्वैव राघवः। हनूमद्वचनाद्दीनस्ततो मोहमुपागतः ॥२९॥

कथयंतं तु सौमित्रिं संनिवार्य बिभीषणः। पुष्कलार्थमिदं वाक्यं विसंज्ञं राममब्रवीत् ॥३०॥

महामोहें अति मोहित। मूर्च्छापन्न श्रीरघुनाथ। तेणें दुःखें दुःखाभिभूत[१]। शोकान्वित

---

**शब्दार्थ :** १. बंधुप्रेमाने, २. निळ्या कमळांनी, ३. किंचित्, ४. शिथिलता, ५.चित्छक्ती, ६. वानरसैन्यांत.

बिभीषण ॥३८॥ लक्ष्मणाचे मांडीवरी। श्रीरामीं विकळता भारी। स्वामी मूर्च्छित कैशापरी। पुसे आदरीं बिभीषण ॥३९॥ कोण लागला आघात। कैसेनि श्रीराम मूर्च्छित। ऐसें बिभीषण पूसत। त्यासी सांगत सौमित्र ॥१४०॥ इंद्रजितानें मारिली सीता। ऐसें हनुमंते सांगतां। मूर्च्छा आली श्री रघुनाथा। उपाय आतां दिसेना ॥४१॥ हनुमंताचा वचनार्थ। मिथ्या न मानी श्रीरघुनाथ। तेणें सांगितला सीतेचा घात। मूर्च्छाभिभूत श्रीराम ॥४२॥ ऐकोनि सौमित्राचें वचन। बिभीषण हास्यवदन। सीतेसी नाहीं जन्ममरण। वृथा कां रुदन तुम्ही करां ॥४३॥ महाकपटीं इंद्रजित। मायिक सीतेचा केला घात। तिचें तळीं नुरेचि प्रेत। कैसेनि सत्य हनुमंत मानी ॥४४॥ अशोकवनाआंत। सीता स्वस्थ आहे तेथ। जाऊन आले माझे दूत। तुम्ही कां रडत अति दु:खें ॥४५॥ सावध नव्हे श्रीरघुनाथ। बिभीषण दु:खाभिभूत। अंगद सुग्रीव जांबवंत। वानर समस्त अति दु:खी ॥४६॥

हनुमंताचे सीतेचे मिथ्यात्व कथन : हे देखोनि हनुमंत। स्वयें आला पैं गर्जत। मारीन इंद्रजित लंकानाथ। मारीन समस्त राक्षस ॥४७॥ मिथ्या मायिक सीताघांत। तळीं तिचें नुरेचि प्रेत। हें म्यां जाणोनि इत्थंभूत। सांगावया येथ मी आलों ॥४८॥ मिथ्या सीतेचें हनन। मिथ्या मूर्च्छित रघुनंदन। ऐकतां हनुमंतगर्जन। झाला सावधान श्रीराम ॥४९॥ श्रीराम आणि हनुमान बळी। खूण पावोनि वरदानमेळीं। पिटिली टाळिया टाळी। झाली तत्काळीं सावध ॥१५०॥ जवळी येतांचि हनुमंत। सावध जाला श्रीरघुनाथ। स्वामिसेवकांचा वृत्तांत। न कळे गुह्यार्थ वेदांसी ॥५१॥ सावध होतां श्रीरामचंद्र। वानरीं केला जयजयकार। रामनामाचा गजर। देती भुभु:कार स्वानंदें ॥५२॥ अशोकवनाप्रती। स्वस्थ आहे सीता सती। हे बिभीषणाची वचनोक्ती। मानी रघुपति त्रिसत्य सत्य ॥ ५३॥ बिभीषणाचें वचन। मिथ्या न मानी रघुनंदन। हर्षें देवोनि आलिंगन। सावधान बैसले ॥५४॥ सांडून मोह शोक दुर्धर। सुखी बैसला सौमित्र। सुखी सुग्रीवादि वानर। गर्जती समग्र रामनामें ॥५५॥ एका जनार्दना शरण। मिथ्या मायिक सीतामरण। जाणोनियां रघुनंदन। सावधान बैसला ॥५६॥ श्रीराम नित्य सावधान। श्रीराम जगाचें जीवन। नाहीं मोहममताबंधन। स्वानंदघन[2] श्रीराम ॥५७॥

श्रीरामांना हर्ष: रामानामाच्या आवर्तीं[3]। मोह ममता समूळ जाती। तो मोह ममता श्रीरामाप्रती। कदा कल्पांतीं घडेना ॥१५८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां मायिकसीतावधो नाम षट्त्रिंशत्तमोऽध्याय: ॥३६॥ ओव्या ॥१५८॥ श्लोक ॥३०॥ एवं ॥ १८८॥

## अध्याय सदतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नम: ॥

### इंद्रजिताचा निकुंबिला प्रवेश

इंद्रजिताने भीतीने निकुंबिळेत गमन केले : हनुमंताचा पर्वतघात। चुकवावया इंद्रजित। स्वयें पळाला बिळा आंत। धुकधुकित अति धाकें ॥१॥ मायिकसीतेचा पैं घात। जाणोनियां हनुमंत। माझा करील प्राणांत। भेणें[4] धाकत इंद्रजित ॥२॥ सांगावया रणवृत्तांत। श्रीरामापासीं गेला हनुमंत। तेव्हा इंद्रजित भयभीत। गेला पळत निकुंबळे ॥३॥

निकुंभिलामथासाद्य जुहुवेग्निमथेंद्रजित् । यज्ञभूभौ तु विधिना पावकस्तेन रक्षसा ॥१॥
हूयमान: प्रजज्वाल जपहोमपरिष्कृत:। सार्चि: पिनद्धो ददृशे पूयशोणिततर्पित: ॥२॥

---

शब्दार्थ : १. दु:खाने परिपूर्ण, २. आनंदपूर्ण, ३. सतत क्रमाने, ४. भीतीने.

सन्ध्यागत इवादित्यः परिवेषसमन्वितः। जुहोति यत्र विधिवद्रक्तोष्णीषं वरस्त्रियः॥३॥
शस्त्राण्यलाबुपत्राणि समिधश्च बिभीतकः। अस्थि कृष्णमृगस्याथ रक्तं जग्राह जीवतः॥४॥
लोहितानि च वासांसि स्रुवं कार्ष्णायसं तथा। सर्वतोऽग्निं समास्तीर्य शनैः पात्रैः सतोमरैः॥५॥

इंद्रजिताचा अभिचारयागाचा आरंभ : जीवें मरील हनुमंत। येणे धाकें इंद्रजित। पळाला निकुंबळेआंत। अभिचारार्थ[1] साधावया॥४॥ मारावया रामसौमित्र। वधावया हनुमान वीर। निर्वाणींचें अभिचार। करी साचार इंद्रजित॥५॥ मारावया रामलक्ष्मण। सुग्रीवादि वानरगण। मारितां न लगे अर्ध क्षण। यालागीं निर्वाणहोम मांडी॥६॥ यक्षिणीवटातळीं। होमकुंड दीर्घ बिळीं। तेथें रिघोनि महाबळी। होम तत्काळीं आरंभी॥७॥ कुंड मंडप विधिविधान। विधियुक्त अग्निस्थापन। शस्त्रांचे परिस्तरण। परिसमूहन मद्याचें॥८॥ नरकपाळें नरशिर तेंचि प्रणीताघृतपात्र। कृष्णच्छागाचें[2] रूधिर[3]। भरिलें सत्वर त्यामाजी॥९॥ जीतकृष्णच्छाग[4] धरूनि पुरा। सर्वांगी घेवोनि शिरा। धरोनियां त्याच्या रुधिरा। त्या त्या पात्रामाजी भरी॥१०॥ शरचाप खड्गादि तोमर। होमाभोंवते शस्त्रसंभार। अभिषिंचूनि समंत्र। मांडी तें तंत्र इंद्रजित जाणे॥११॥ अभिचाराचिये अभिव्यक्ती। शस्त्रांसीं यावया पूर्ण शक्ती। इंद्रजित मंत्रव्युत्पत्तीं। मांड विध्युक्त विभागें॥१२॥ शस्त्रशक्तीं अवधिया। मंत्रसामर्थ्य आकळोनियां। आरक्तओष्ठी क्रूर स्त्रिया। आणिलिया यज्ञवाटा॥१३॥ लोहसाराचा स्रुकस्रुवा। तेणें पात्रें होम करावा। होम द्रव्यांचा यावा[5]। विधिगौरवा तो ऐका॥१४॥ लवण सर्षप[6] भिल्लातक[7]। कालवोनि मातंगीचें[8] रक्त। मद्य मेळवोनि त्याआंत। होम मंत्रोक्त विधिवादें॥१५॥ जेंवी मिरवे बाळादित्य। तेंवी अग्नि धगधगित। परिस्तरणीं सुशोभित। होम करीत इंद्रजित॥१६॥ काळीचिडी कांकणघारी। उलूक खिळोनि त्यामाझारी। कृष्णसर्प अर्धशिरीं। होमावरी बांधिला॥१७॥ त्या सर्पाचें स्रवे गरळ। तेचि वसोर्धारा प्रबळ। मानी इंद्रजित अमंगळ। पापी केवळ अभिचारी॥१८॥ प्राणियासी करोनि घात। पूर्ण रुधिर धरोनि बदबदित। मेळवोनि ब्राह्मणाचें रक्त। होम करीत इंद्रजित॥१९॥ बेहडा अपवित्र जगांत। त्याच्या समिधा[9] होम करित। कडू भोपळयाच्या पात्राआंत। मद्य भरित होमार्थ॥२०॥ आरक्त वस्त्र आरक्त विराजित। रक्ताचा टिळा मस्तकांत। आरक्त माळा कंठी शोभत। अभिचारयुक्त इंद्रजित॥२१॥ जपहोम मंत्रयुक्त। विकळ उच्चार[10] हो नेदित[10]। इंद्रजित स्वयें होम करित। अभिचारार्थ साटोपें॥२२॥ सरड बेडूक मत्स्य मगर। पिंगळा बोलका गीध घार। होमीं जाळिती अपार। निशाचर महापापी॥२३॥ यापरी इंद्रजित। निकुंबळे होम करित। जाणोनि त्याचा वृत्तांत। बिभीषण सांगत श्रीरामा॥२४॥

निकुंभिलायां काकुत्स्थ जुहोति हि न संशयः। सबलास्तत्र गच्छामो यावत्तन्न समाप्यते॥६॥
लक्ष्मणं प्रेषयास्माभिः सह सैन्यानुकर्षिभिः। एष तं नरशार्दूल रावणिं निशितैः शरैः॥७॥
त्याजयिष्यति तत्कर्म प्राणनिष्ठां च संयुगे। तपसा तेन वीरेण वरदानात्स्वयंभुवः॥८॥
अस्त्रं ब्रह्मशिरः प्राप्तं कामगाश्च हयोत्तमाः। स एवं विदधे चास्य धीमतः पुण्यकर्मणः॥९॥
निकुंभिलामसंप्राप्तमकृताग्निं च यो रिपुः। त्वामाव्हयिष्टते युद्धे इंद्रशत्रो स ते वधः॥१०॥
इत्येवं तस्य विहितो वधोपायो दुरात्मनः॥११॥

बिभीषणाची श्रीरमांना अभिचारायागाच्या प्रतिकाराची विनंती : बिभीषण सांगे श्रीरामाप्रती। इंद्रजित अभिचारहोमस्थितीं। निकुंबळे गेलासे दुर्मती। कपटानुवृत्ति दुरात्मा॥२५॥ ब्रह्मवरदी

शब्दार्थ : १. जारणमारणविधी, २. काळ्या बोकडाचे, ३. रक्त, ४. जीत= जिवंत, ५. समुदाय, ६. मोहरी, ७. बिब्बे, ८. मागिणीचे, ९. समिधांनी, १०. होऊ दिला नाही.

शिववरदी। अभिचारहोमविधीं। तत्काळ त्यासी व्हावी सिद्धी। वरद त्रिशुद्धीं तयासी॥२६॥ होम न होतां संपूर्ण। मध्येंचि विध्वंसिल्या जाण। तेंचि इंद्रजितासी मरण। शिववरदान सत्यत्वें॥२७॥ होम न होतां समाप्ती। मध्येचि जाल्या विघ्नप्राप्ती। तेणे मरण रणावर्तीं[1]। हे वचनोक्ती ब्रह्मयाची॥२८॥ वरदास्तव इंद्रजिता तेथ। ब्रह्मशिरोस्त्र जाल्या प्राप्त। कामग[2] हय[3] कामग रथ। तेणें तो विख्यात तिहीं लोकीं॥२९॥ तेणें बळें रणकडाडीं। देव जे कां तेहतीस कोडी। इंद्रजित घाली बांधवडीं। वरदप्रौढीप्रतापें॥३०॥ येणेंचि बळें युद्धाआंत। इंद्र धरिला जीवें जीत। नांव पावला इंद्रजित। शिववरदार्थप्रतापें॥३१॥ ते घोडे आणि तोचि रथ। रणीं ने जिंकवे रघुनाथ। दोहीं शरबंधां केला घात। प्रतापवंत श्रीराम॥३२॥ दों शरबंधीं इंद्रजित। युद्धी परम प्रातपवंत। त्याचा श्रीरामें केला घात। इंद्रजित तळमळी॥३३॥ तेणें रागें इंद्रजित आपण। मारावया श्रीरामलक्ष्मण। अभिचार करितो निर्वाण[4]। अति दारुण विधिभागें[5]॥३४॥ पुढेंमागुता युद्धाआंत। न चले शरबंध पुरुषार्थ। श्रीरामें छेदिला वरदार्थ। तळमळित इंद्रजित॥३५॥ त्याच्या कर्मा करावया विघ्न। बिभीषण निघाला आपण। मजसवें द्यावा लक्ष्मण। वीर दारुण प्रतापी॥३६॥ लक्ष्मण वीर धीर। लक्ष्मण परम शूर। करील इंद्रजिताचा संहार। सखा सौमित्र प्रतापी॥३७॥ होमस्थान अति गुप्त। आणिकासी नव्हे प्राप्त। तें मी दाखवीन साद्यंत। करावया घात इंद्रजिताचा॥३८॥ होम झालिया समाप्त। इंद्रजित तीन्ही लोकां अजित। करील समस्तांचा घात। हा वरदार्थ शिवाचा॥३९॥ या लागीं अति शीघ्रगतीसीं। श्रीरामा आज्ञा देई आम्हासीं। सवें द्यावें सौमित्रासी। विघ्न होमासीं करावया॥४०॥ सुटल्या सौमित्राचा बाण। विध्वंसील होमस्थान। इंद्रजित उठतांचि जाण। घेईल प्राण रणमारें॥४१॥ त्याच्या होमासीं होतांचि विघ्न। रणीं इंद्रजित मरेल जाण। ऐसें शिवाचें वरदान। यालागीं आपण धाडावें शीघ्र॥४२॥

बिभीषणवचः श्रुत्वा रामो लक्ष्मणमब्रवीत्। जानामि तस्य रौद्रस्य मायामेतां दुरात्मनः॥१२॥
तस्यांतरिक्षे चरतः सरथस्य परंतप। न गतिर्वेदितुं शक्या सूर्यस्येवाभ्रसंप्लवे॥१३॥
तं मायागमसंप्राप्तं महावीर्यमरिंदमम्। जहि बाणैरिदं कर्म कुरु सत्यपराक्रमम्॥१४॥
यदृक्षराजस्य बलं तेन सर्वेण संवृतः। युवराजोंऽगदः सार्धमनेन च हनूमता॥१५॥
गच्छ तं राक्षसेंद्रस्य तनूजं जहि लक्ष्मण॥१६॥

**श्रीरामांचा उपदेश व लक्ष्मणाला आज्ञा :** ऐकोनि बिभीषणवचन। संतोषला रघुनंदन। पाचारोनियां लक्ष्मण। काय आपण सांगत॥४३॥ तूं निधडा वीरपंचानन[6]। रणरंगी रणप्रवीण। इंद्रजित महामायावी[7] जाण। कपटी संपूर्ण वंचक[8]॥४४॥ उभा न राहे युद्धा क्षितीं[9]। सवेग जाणें नभस्थिती। रथ वारु सारथी। गुप्तगतीं खेचर॥४५॥ जेंवी कां गगनी गभस्ती[10]। अभ्रांमाजी न ये व्यक्ती[11]। तेंवी इंद्रजित गुप्तगती। रणानुवृत्ती[12] लक्षेना॥४६॥ कवडा राहोनियां गगनीं। अलक्ष मीन लक्षी जीवनीं[13]। तेंवी इंद्रजित गुप्तगतीं रणीं। सूक्ष्मदर्शनीं लक्षावा॥४७॥ नांव रूप गुण लक्षण। स्वयें सांडावें विवंचून। लक्षावें कारणाकारण। सूक्ष्मदृष्टि जाण या नांव॥४८॥ लक्षिल्या कारणाकारण। न करितांही रणांगण। इंद्रजित मरेल हा पण। मात्रार्थ[14] बाण विंधितां॥४९॥ यापरी रणरंगीं। शत्रु मारावा अंगोअंगी[15]। पंगिस्त[16] न व्हावें दुजियालागीं। हें रणभागीं लक्षूनी॥५०॥ यापरी सौमित्रासी। संग्रामां

---

**शब्दार्थ :** १. भर लढाईत, २. इच्छिले ठिकाणीं जाणारे, ३. घोडे, ४. निकराचा, ५. विधिविधानाप्रमाणे, ६. वीरश्रेष्ठ, ७. मोठा कपटी, ८. फसविणारा, ९. जमिनीवर, १०. सूर्य, ११. उघडकीस, १२. युद्धाच्या गर्दीत, १३. उदकांत, १४. अत्यल्पही, १५. पूर्णपणे, १६. पराधीन.

धाडी इंद्रजितासीं। सवें धाडिले वानरांसी। निधड्या वीरांसी तें ऐका॥५१॥ बळवंत बुद्धिवंत। अंगद युवराज विख्यात। ससैन्य निघे जांबवंत। सैन्यासमवेत चालिला॥५२॥ भरंवशाचा वीर विख्यात। सवें दिधला हनुमंत। ज्याचेनि बळें श्रीरघुनाथ। स्वयें निश्चित सर्वार्थी॥५३॥ अतिशयें बळें प्रबळ। सवें दिधले नळनीळ। देखोनि वानरांचा मेळ। हर्ष प्रबळ सौमित्रा॥५४॥ जावोनियां निकुंभिलेसीं। युद्ध करावया इंद्रजितासीं। अति उल्लास लक्ष्मणासी। आलें बाहूंसी स्फुरण॥५५॥

अयं त्वां सचिवैः सार्द्धं महात्मा रावणानुजः। अभिज्ञस्तस्य देशस्य पृष्ठतोऽनुगमिष्यति॥१७॥
स रामस्य वचः श्रुत्वा लक्ष्मणः परवीरहा। जग्राह कार्मुकं श्रेष्ठं भीमं भीमपराक्रमः॥१८॥
सन्नद्धः सशरः खड्गी कवची वामचापभृत्। रामपादावुपस्पृश्य हृष्टः सौमित्रिरब्रवीत्॥१९॥
अद्य मत्कार्मुकोत्सृष्टाः शरा निर्भिद्य रावणिम्। लंकामभिपतिष्यंति हंसाः पुष्करणीमिव॥२०॥

**श्रीराम लक्ष्मणाबरोबर बिभीषण व हनुमंत यांना पाठवितात :** श्रीराम म्हणे सौमित्रासी। तुम्ही गेलिया निकुंभिलेसीं। यज्ञवाट न कळे तुम्हांसी। अति गुप्तेसीं महागूढ॥५६॥ त्या यज्ञवाटाचें लक्षण। अति गूढ गुप्त गहन। रिगिनिगी स्थानमान। तें बिभीषण सांगेल॥५७॥ यालागीं तुम्हांसागातें। मी देतों बिभीषणातें। तुम्हीं संरक्षावें यातें। जेंवी जीवातें निजात्मा॥५८॥ माझा जीव आत्मा प्राण। तो हा मूर्तिमंत बिभीषण। यासी रक्षावें आपण। अवघे जण मिळोनी॥५९॥ महाकपटी इंद्रजित। सितरोनि[1] करील घात। मारिलिया शरणागत। तोचि कल्पांत आम्हांसी॥६०॥ सांगतां त्याचें वर्म कर्म। इंद्रजितासीं द्वेष परम। ठकून करील घातक धर्म। पापकर्मा पापात्मा॥६१॥ राम सांगे हनुमंतासी। संरक्षावें बिभीषणासी। साह्य व्हावें सौमित्रासी। दोघे तुजपासीं दिधले॥६२॥ ऐकतां श्रीरामवचन। हनुमंतासीं उल्लास पूर्ण। तुझें नाम संरक्षण। सर्वार्थी जाण सर्वदा॥६३॥ रामा तुझिया नामाचें। आम्हांसी वज्रकवच साचें। भय नाहीं कळिकाळाचें। इंद्रजिताचें तोंड कोण॥६४॥ ऐसें ऐकतां वचन। लक्ष्मणासी आलें स्फुरण। सज्जोनियां धनुष्यबाण। जाला आपण सन्नद्धबद्ध॥६५॥ कवची खड्गी हेममाळा। लक्ष्मणें घालोनि गळां। येवोनि श्रीरामाजवळां। चरणकमळा वंदित॥६६॥

**लक्ष्मणाचे प्रयाण :** वंदूनि श्रीरामचरण। करोनि त्रिवार प्रदक्षिण। लक्ष्मण बोले आंगवण। सावधान अवधारा॥६७॥ आजि माझे सुटल्या बाण। घेतील इंद्रजिताचा प्राण। सव्यबाहु तोडून जाण। पाठवीन लंकेसीं॥६८॥ हंस बुडी देती पुष्करणीसीं। तेंवी बाण भेदती राक्षसांसीं। ऐसें बोलोनि श्रीरामासी। संग्रामासी निघाला॥६९॥

निकुंभिलामभिययौ हंतुं रावणिमाहवे। बिभीषणेन सहितो राजपुत्रः प्रतापवान्॥२१॥
कृतस्वस्त्यनो भ्रात्रा लक्ष्मणो निर्ययौ तदा। वानराणां सहस्रेश्च हनूमान्बहुभिर्वृतः॥२२॥
बिभीषणश्च सहसा रामभ्रातरमन्वगात्। महाकपिबलौघैस्तु संपतन्निव सर्वतः॥२३॥
ऋक्षराजबलं चैव महाभ्रमिव नादयन्। स गत्वा दूरमध्वानं सौमित्रिर्मित्रनंदनः॥२४॥

वधूं जातां वृत्रासुरासी। जें स्वस्त्ययन[2] केलें इंद्रासीं। तें स्वस्त्ययन सौमित्रासीं। करी आदरेंसीं श्रीराम॥७०॥ बाणें छेदावया त्रिपुरासी। जें स्वस्त्ययन शंकरासीं। तें स्वस्त्ययन सौमित्रासीं। करी साक्षेपेंसीं[3] श्रीराम॥७१॥ मर्दू जातां मुर दैत्यासी। जें स्वस्त्ययन केलें भगवंतासीं[4]। तें स्वस्त्ययन सौमित्रासीं। करी साक्षेपेंसीं श्रीराम॥७२॥ ऐसें करोनि स्वस्त्ययन। स्वयें हनुमंत बिभीषण। देवोनियां वानरसैन्य। धाडी लक्ष्मण निकुंभिलेसीं॥७३॥ काळें अभ्र अति गहन। तैसें जांबवंताचें सैन्य। करितां रामनामगुणगुण। निकुंभिले जाण

**शब्दार्थ :** १. फसवून, २. कल्याणप्रद आशीर्वचन, ३. अगत्याने, ४. श्रीकृष्णाला.

निघालें ॥७४॥ नळ नीळ अंगद जांबवंत। आतुर्बळी हनुमंत। बिभीषण विचारवंत। सर्वे चालत सौमित्र ॥७५॥ बिभीषणाचे प्रधान चारी। मार्गद्रष्टे चतुर भारी। चालती अवधियांच्या पुढारीं। अंतरावरी साटोपें ॥७६॥ किराणें[1] करिती वानरवीर। चढले निकुंभिलापाठार। पुढें देखिलें दुर्धर। घोरांदर महावन ॥७७॥

निबिड वनाचे छेदन : वनवृक्ष वनस्थळीं। कंटक निबद्ध समूळीं। उडों जातां गोळांगुळी[2]। होती चिरफळी अंगाची ॥७८॥ कंटकीवन घोरांदर। रिघों न शकती वानर। तेथें केंवी रिघती राजकुमर। अटक थोर ओढवली ॥७९॥ मार्ग पाहतां चौपासीं। जागले रोधिले दशदिशीं। वाट न फुटे वारियासी। पुढें कोणासी न चालवे ॥८०॥ पुसतां बिभीषणा पुढां। मार्ग न कळे चहूंकडां। तोही लागतांचि वेडा। वहिला मेढा सौमित्रें ॥८१॥ वर्षोनियां बाणजाळी । विपिन छेदितां समूळीं। वनदेवता सकळी। देती आरोळी अति दुःखें ॥८२॥

वनदेवतांची शरणागती व हनुमंताला सत्यकथन: वनदेवता समस्ता। त्या वांचवावया निजजीविता। शरण आल्या हनुमंता। सांगावया घाता इंद्रजिताच्या ॥८३॥ आम्हांस केलीसे खिळणी। बोलावया नुखळे[3] वाणी। ऐसें हनुमंतें ऐकोनी। गर्जला वाणी रामनामें ॥८४॥ तुम्ही वनदेवता समस्ता। श्रीरामनाम स्मरा आतां। ऐसें हनुमंतें सांगतां। जाल्या निर्मुक्ता वनदेवता ॥८५॥ स्मरतां रामनामवाणी। पळाल्या खिळणीपिळणी। अभिचारा समूळ धुणी। नामस्मरणीं बडिवारें ॥८६॥ वनदेवी उल्लासतां। चरणीं लागती हनुमंता। तूं तंव आमुचा प्राणदाता। खिळणी समस्ता सोडविल्या ॥८७॥ खिळणीपिळणी समस्ता। तुवां उपडिल्या हनुमंता। करावया इंद्रजिताचिया घाता। सांगतो आतां तें शीघ्र करीं ॥८८॥ जो हें छेदील कंटकवन। त्याचेनि हातें इंद्रजित आपण । तत्काळ पावेल मरण। हें भाषण शिवाचें ॥८९॥ प्रथम बंध कंटकविपिन[4]। दुजा बंध महापर्जन्य। तिजा झंझावात दारुण। चौथें आवरण महासर्प ॥९०॥ पांचवें पिशाच जाण क्रूर। सहावें गुप्त हतियेर। सातवा तो राक्षससंभार। निशाचर महायोद्धे ॥९१॥ यक्षिणीवटातळीं प्रबळ। अति गुप्तत्वें महबिळ। त्यामाजी आहे होमशाळ। अलक्ष ते स्थळ लक्षेना ॥९२॥ येणें अभिचारें इंद्रजित। जाला तिहीं लोकीं अजित। इंद्र धरिला जीवें जीत। येथील अर्थ साधूनी ॥९३॥ ऐसें वनदेवी सांगतां। वृत्तांत कळला हनुमंता। नमस्कारोनि वनदेवता। सन्मानता आश्वासी ॥९४॥

लक्ष्मणाच्या बाणाने पर्जन्यबंधाचे निवारण : यापरी जिणोनि कंटकवन। पुढें उल्लासें करी गमन। लागला दुस्तर पर्जन्य। अति दारुण अनिवार्य ॥९५॥ उतटों पाहती गिरिकूट। ऐसा विजुवांचा कडकडाट। धारा येती अति अचाट। प्रळयो स्पष्ट ओढवला ॥९६॥ मेघ जिणोनि हरिला शब्द। नांव पावला मेघनाद। तेणें मार्गें करावया रोध। घन सुबद्ध वर्षवी ॥९७॥ लागतां पर्जन्याच्या धारा। अति हुडहुडी वानरां। कोप चढिला सौमित्रा। धनुष्यीं शरा सज्जिलें ॥ ९८॥ मेघ गर्जतां कडकडाटा। लक्ष्मणें विंधोनि खिळिल्या वाटा। पर्जन्य राहिला थेंबटा। कोरड्या वाटा चालिले ॥९९॥ देखोनि सौमित्राचें बळ। मेघीं सांडिले निरोधस्थळ[5]। अंगी खडतरतां बाणजाळ। मेघ सकळ निवारिले ॥१००॥

हनुमंताकडून झंझावाताचे निवारण : पुढें चालता समस्त। वायु सुटला झंझावात। वानर उडविले गगनांत। जेंवी तृणातें वाहुटळी ॥१॥ लक्ष्मण शेष तत्वतां। सहस्रमुखीं वायु भक्षितां। निवारोनि झंझामारुता। होय सज्जिता महाशस्त्र ॥२॥ वायु जो कां निजपिता। त्यासी हनुमान होय पुसता। मार्ग रोधणें रामदूता। कवण्या अर्था त्वां केलें ॥३॥ हा इंद्रजितमंत्रवात। खिळोनि

शब्दार्थ : १. उड्डाणे, २. वानर, ३. उघडत नाही, ४. काट्यांचे रान, ५. अटकाव करण्याची जागा.

रोखिला मार्ग रोधित। तोही तुझा अंशभूत। म्हणे हनुमंत निवारीं ॥४॥ ऐकोनि हनुमंतवचन। मोकळें केलें मार्गरोधन। वायु वायूचें करी प्राशन। वानरगण उल्लासती ॥५॥ पुढें चालतां हर्षयुक्त। कालियनाग अपरिमित। सर्प उठिले अत्यद्‌भुत। स्वयें वमित महागरळा ॥६॥ हनुमान म्हणे सौमित्रा। गरुडास्त्रा नकुळास्त्रा। घालोनि पिपीलिकास्त्रा। सर्पां समग्रा निर्दळीं ॥७॥ लक्ष्मण शेष इत्थंभूत। सर्पसंहारा कळवळित। मज गमन करितां येथ। मार्गरोधार्थ कां केला ॥८॥ वंदून लक्ष्मणाचे चरण। सर्प सांगती आपण। आम्हांसी महामंत्री खिळून। मार्गरोधन करविलें ॥९॥ ऐकोनि सर्पांचा वचनार्थ। श्रीरामनामाच्या गजरांत। खिळणीं पळाली चळीं कांपत। केलें निर्मुक्त महासर्प ॥११०॥

कंकाळ वेताळ यांचे हनुमंताकडून निर्दालन : पुढें चालतां कपिपुंगव[१]। कंकाळ[२] वेताळ नग्न भैरव। झोटिंग पिशाच प्रेत सर्व। घेवोनि धांव छळों येती ॥११॥ शुकी[३] मैळी[३] महाकंकाळी। प्रेतउच्छिष्टचांडाळी। देवोनियां आरोळी। त्याही सकळी धांविन्नल्या ॥१२॥ खाखाते खिखाते। कातिया त्रिशूळ घेवोनि हातें। अवघीं घाघातें घुंघातें। आलीं समस्तें छळवया ॥१३॥ येतां देखोनियां भूतें। उड्डाण केलें हनुमंतें। कवळोनि मारितां समस्तें। शरणागतें तीं आलीं ॥१४॥ सांगती इंद्रजित कपटराशी। कोणी न यावया यज्ञवाटासीं[४]। मंत्रीं खिळोनि आम्हांसी। मार्गरोधासीं[५] राखिलें ॥१५॥ ऐसी ऐकोनि त्यांची मात। त्यांसी तुष्टला हनुमंत। गर्जोनि श्रीरामनामावर्त। केला निर्मुक्त भूतसमूह ॥१६॥ भूतें म्हणती हनुमंता। आम्हांसी आज्ञा देईं आतां। मारोनी राक्षसां समस्तां। विजयी सर्वथा होशील ॥१७॥ हनुमंत म्हणे भूतांसी। सुखें राहावें स्वेच्छेसीं। आम्ही मारूं राक्षसांसी। तुम्ही प्रेतांसीं भक्षावें ॥१८॥ भूतें सांगती हनुमंतासी। गुप्त शस्त्रें भंवती[६] आकाशीं। पुढारें जातां तुम्हांसी। ती सर्वांसी वधितील ॥१९॥ ऐसें हनुमंतें ऐकतों। ज्या का शस्त्रास्त्रदेवता। ज्यांचेनि शस्त्रें करिती घाता। त्या समस्ता आकळिल्या ॥१२०॥ पुच्छें कवळोनि देवता। हनुमंतें करिता घाता। मारूं नको गा कपिनाथा। येती समस्ता काकुळती ॥२१॥ इंद्रजित महाकपटमूर्ती। आम्हां खिळोनि मंत्रोक्तीं। आम्हांसी स्थापी मार्गरोधनार्थी। दुःखाभिभूत महादुःखी ॥२२॥ ऐसें हनुमंतें ऐकतां। रामनामस्मरणावस्था। शस्त्रदेवता समस्ता। केल्या निर्मुक्त रामनामें ॥२३॥ शस्त्रदेवता समस्ता। नमस्कारोनि हनुमंता। करोनि इंद्रजिताच्या घाता। यश सर्वथा पावाल ॥२४॥ घेवोनियां वानरवीर। सवेग चालतां सौमित्र। पुढें निशाचारभार[७]। अति दुर्धर देखिला ॥२५॥

राक्षसेंद्रबलं दूरादपश्यन्व्यूह्य संस्थितम्। अथ तं समवस्थाप्य लक्ष्मणं रावणानुजः ॥२५॥
परेषामहितं वाक्यं स्वार्थसाधनमब्रवीत्। अस्यानीकस्य महतो भेदने यत लक्ष्मण ॥२६॥
राक्षसेंद्रसुतो ह्यत्र भिन्नदेहो भविष्यति। बिभीषणवचः श्रुत्वा संप्रहृष्टः स लक्ष्मणः ॥२७॥
राक्षसेषु महाभीमं शरबर्षमवर्षत ॥२८॥

नंतर राक्षससैन्याचे निर्दालन : देखोनि राक्षसांचा भार। उल्लासला सौमित्र। बिभीषण येवोनि सत्वर। सांगे विचार संग्रामा ॥२६॥ राक्षसभार दिसतो येथ। त्यामाजी इंद्रजित अति गुप्त। बिळामाजी होम करित। कर्म समाप्त करावया ॥२७॥ त्याच्या कर्मा करावया घात। राक्षस निर्दळतां येथ। प्रकट होईल इंद्रजित। जाण निश्चित सौमित्रा ॥२८॥ ऐकोनि बिभीषणउत्तर। उल्लासला वीर सौमित्र। सज्जोनियां चाप शर। राक्षसभार निर्दळित ॥२९॥ रणीं खिळोनि वानर। मारिती राक्षसांचे भार। घोळसोनियां वानर। निशाचर भिडताती ॥१३०॥

---

शब्दार्थ : १. वानरश्रेष्ठ, २. पिशाचगणविशेष, ३. जलदेवताविशेष, ४. यज्ञाच्या जागेमध्ये, ५. मार्ग अडविण्याकरिता, ६. फिरत आहेत. ७. राक्षससमुदाय.

ऋक्षाः शाखामृगाश्चैव वृक्षशैलशिलायुधाः। अभ्यधावन्त संहृष्टास्तदनीकं बिभित्सवः॥२९॥
राक्षसाश्च शितैः शूलैरसिभिः पट्टिशैः शरैः । उद्यतैस्त्वरिताः सर्वे कपीनभिजिघांसवः॥३०॥
ऋक्षवानरमुख्यैश्च महाकायैर्महाबलैः। रक्षसां युद्ध्यमानानां महद्भयमजायत॥३१॥

रीस[1] आणि वानरभार। शैला शिला साल तरुवर। करोनि राक्षसांसी मार। देती भुभुःकार रामनामें॥३१॥ शूळ त्रिशूळ चाक शर। असि[2] पट्टिश परिघ तोमर। शस्त्रास्त्रीं निशाचर। करिती मार वानरां॥३२॥ गगनीं उसळोनि मर्कट। शस्त्रघात केले सुनाट[3]। वानरीं वर्षोनि गिरिकूट[4]। केलें सपाट राक्षसां॥३३॥ लागतां पर्वतआघात। राक्षस पळाले समस्त। यक्षिणीवट केला निर्मुक्त। आले समस्त त्या ठायां॥३४॥ यक्षिणीवट अति दुर्धर। देखतांचि भयंकर। सेंदुरें धगधगीत क्रूर। नरवानर भयभीत॥३५॥ सहस्रयोजन शाखा थोर। ऐसिया शाखा अति अपार। घुघुशब्दें गर्जे घोर। वटविस्तार भयानक॥३६॥ वटवृक्ष भयंकर। त्यातळीं गुप्त होमविवर[5]। त्याहीमाजी इंद्रजित वीर। करी अभिचारहोमातें॥३७॥ तेथें हिंडतां गोळांगूळ[6]। लक्षेना तें होमबीळ। अति गुप्त वटमूळ। वेडा सकळ लाविले॥३८॥ येवोनियां बिभीषण। स्वयें पाहत आपण। लक्षेना तें होमस्थान। अवघे जण सचिंत॥३९॥ होम न होतां समाप्त। आम्हीं प्रवेशावें तेथ। विवरद्वार नव्हे प्राप्त। वेडा समस्त लाविले॥१४०॥ तेव्हां खवळला हनुमंत। वड उपडोनियां तेथ। शोधीन विवरद्वार गुप्त। तरी मी दूत रामाचा॥४१॥

वनदेवतांचे हनुमंताला गुह्य कथन : वनदेवता शस्त्रदेवता। ज्या हनुमंतें केल्या मुक्ता। त्याही येऊनि समस्ता। गुह्य हनुमंता सांगती॥४२॥ यक्षवटींची यक्षिणी। मुख्य आमुची स्वामिनी। इंद्रजितानें करोनि खिळणी। विवररक्षणीं राखिलीसे॥४३॥ तिसीं केलिया निर्मुक्त। विवरद्वार होईल प्राप्त। ऐसें ऐकतां हनुमंत। उल्लासित उसळला॥४४॥ वटाग्रीं खिळिली यक्षिणी। हनुमान तेथें गेला उडोनी। रामनामाच्या स्मरणीं। अर्धक्षणीं केली मुक्त॥४५॥ मुक्ता होतांचि यक्षिणी। लागली हनुमंताच्या चरणीं। वटमूळासीं आणोनी। बीळ उघडोनी दाविलें॥४६॥ उघडितां बिळद्वार। रामनामाचा गजर। वानर करिती जयजयकार। हर्षें निर्भर अवघेही॥४७॥ द्वार उघडितां यक्षिणींसीं। कपाट नुघडे तियेंसीं। शिणतां नाना युक्तींसीं। अलक्ष्य तिसीं लक्षेना॥४८॥ इंद्रजितकपाटाच्या अर्गळा[7]। वज्रार्गळा भुवार्गळा। देवोनि दुबंद्या सांखळा। अढळ शिळा लाविल्या॥४९॥ कोणी न ये होमाप्रती। ऐसी करोनि निश्चिती। इंद्रजित बैसला होमाप्रती। जाण मारुती कपिराजा॥१५०॥ कपाट उघडावया येथ। तुम्ही विचारा समस्त। ऐसे यक्षिणी सांगत। तंव हनुमंत क्षोभला॥५१॥ कपाट उघडावया जाण। चिंताग्रस्त बिभीषण। चिंतावर्ती वानरगण। तंव लक्ष्मण खवळला॥५२॥ विंधोनियां वज्रबाण। कपाट करीन शतचूर्ण। याचा संदेह तो कोण। चाप संपूर्ण सज्जिलें॥५३॥ बाण लावितांचि शितीं[8]। हनुमंतें धरिला हातीं। कपाट बापुडें तें किती। तुवां तें अर्थी न शिणावें॥५४॥

हनुमंताच्या वज्रमुष्टीने कपाटाचे चूर्ण : मी तंव घरगुती सेवक। पाहें माझें कवतुक। म्हणोनि दिधली हाक। लोकालोक[9] दुमदुमिले॥५५॥ दिग्गजांसीं बैसली टाळी। नक्षत्रें पडती भूतळीं इंद्रजित दचके होमसमेंळीं। कपिआरोळी ऐकोनि॥५६॥ कैसेनि आला रे मारुती। इंद्रजित पडला चिंतावर्ती। जपहोम न रुचे चित्तीं। पूर्णाहुती विसरला॥५७॥ न होतां दुजियाचें आगमन। माझें दुश्चित झालें मन। होमसिद्धीसीं पडिलें विघ्न। विधिविधान नाठवे॥५८॥

---

शब्दार्थ : १. अस्वले, २. तरवार, ३. शून्य व्यर्थ, ४. पर्वतशिखरे, ५. होम करण्याची गुहा, ६. वानर, ७. अडसर, ८. दोरीला, ९. सूर्याच्या प्रकाशमर्यादेचे पर्वत.

बहुत आवरणें बाहेरी। हनुमान येईल कैशापरी। म्हणोनि बैसें होमावरी। ध्यान निर्धारीं धरोनी॥५९॥ येरीकडे हनुमंत। कपाट भेदून समर्थ। काळ खवळला कृतांत। करावया घात होमाचा॥१६०॥ कपाटीं रोहोकोनियां[1] दृष्टीं। वळोनियां वज्रमुष्टी। कपाट हाणितां जगजेठी। कडकडाटीं वट गर्जे॥६१॥

इंद्रजित व अभिचार यज्ञाचे दर्शन : घायें कपाटें केलीं पिष्ट। वज्रार्गळा शतकूट। शिळा सांखळ्या करोनि पीठ। यज्ञवाट देखिलें॥६२॥ तया यज्ञवाटाआंत। होमधर्मीं व्यवस्थित। बैसला देखोनि इंद्रजित। ध्यानान्वित अभिचारें॥६३॥ मनुष्यरक्तें अति विराजित। वस्त्रें नेसला आरक्त। रक्तचंदन मस्तकांत। माळा आरक्त सुमनांच्या[2]॥६४॥ प्रेतावरी विकटासन[3]। मनुष्यरक्ताचें हवन। धूपदीप हुताशन[4]। यजमानविघ्नसूचक॥६५॥ मोकळें पडतां यज्ञद्वार। आला वानरांचा भार। रामनामाचा गजर। जयजयकार करीतचि॥६६॥ बिभीषण आणि सौमित्र। वानरा वीरांचा भार। इंद्रजित देखिला महाक्रूर। होमतत्पर ध्यानस्थ॥६७॥ सटवलीं तान्हीं बाळकें। होम करीं तेणें सिसाळें। काढोनियां अंत्रमाळें। पूजी कंकाळें कराळीं॥६८॥ तान्ही बाळें आकळोनी। खिळुनीं आणिल्या बाळंतिणी। रजस्वला मातंगिणी। न्हाणिली परटिणी सवंदणीजळें[5]॥६९॥ कृष्णमेषाच्या दावणी। आणीक जीवांचियां श्रेणी। आणिल्या असती खिळोनी। अभिचारहवनीं होमावया॥१७०॥ गर्जतां रामनामवाणी। पळालिया खिळणीपिळणी। सोडिल्या जीवश्रेणी। कृपा करोनी हनुमंतें॥७१॥ बैसोनियां अति ध्यानस्थ। इंद्रजित एकाग्र होम करित। त्यासी उठवील हनुमंत। होम समाप्त न होतांचि॥७२॥ उठवितां इंद्रजितवीर। त्यासीं भिडेल पैं सौमित्र। युद्ध होईल घोरांदर। अति दुर्धर संग्राम॥७३॥ दोघे वीर विचक्षण। दोघे जण रणप्रवीण। एका जनार्दना शरण। रणविंदान अवधारा॥७४॥ एका जनार्दनीं वचनार्थ। निजपरमार्थ वदनीं वदतां श्रीरघुनाथ। श्रीराम चालवी कार्यार्थ। एका जनार्दनीं वचनार्थ। श्रीरामें॥१७५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां निकुंभिलाबिलप्रवेशनं नाम सप्तत्रिंशत्तमोऽध्यायः॥३७॥ ओंव्या॥१७५॥ श्लोक॥३१॥ एवं॥ २०६॥

## अध्याय अडतिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### इंद्रजिताचे मेघपृष्ठावर गमन

निकुंबिळेत वानरप्रवेश झाला तरी इंद्रजित ध्यानमग्न : वानर बिळीं प्रवेशोन। जालें इंद्रजितदर्शन। बैसला आहे धरून ध्यान। जपावदान होमनिष्ठा॥१॥ वानरीं आंसुडितांचि जाण। तो न सांडी प्रेतासन। त्याचें भंगेना तें ध्यान। जपावदान होमनिष्ठा॥२॥ घाय हाणितां दारुण। इंद्रजिताचें भंगेना ध्यान। हातींचें न राहे अवदान। होमविधान जपनिष्ठा॥३॥ वानरवीरांचिया श्रेणी। शंख करिती दोनी कानीं। इंद्रजित डंडळीना[6] ध्यानीं। होमविधानीं सादर॥४॥ कष्टतांही वानरगण। ध्याना भंगेना अणुप्रमाण। हातींचें न राहे अवदान। होमविधान खुंटेना॥५॥ तये काळीं बिभीषण। त्याचें भंगावया ध्यान। मायामंदोदरी निर्माण। करित रुदन आणिली॥६॥ रडत पडत आक्रंदत। आणिली होमशाळेआंत। जेथें बैसला इंद्रजित। शंख करीत तेथें आली॥७॥ रावणाच्या दहाही शिरीं। भरोनियां ओंटी

**शब्दार्थ :** १. लावून, २. फुलाच्या, ३. भयंकर बैठक, ४. अग्नी, ५. चांभाराच्या कुंडीतील पाण्याने, ६. हालेना, चळेना.

भरी। नानापरींच्या दीर्घ स्वरीं। रुदन करीं तें ऐका॥८॥ रणीं मारिला दशानन। अझून कायसें रे ध्यान। उघडोनि निजनयन। पाहें दर्शन पित्याचें॥९॥ माझा करसील कैवाड[1]। घेशील रावणाचा सूड। आलें तंव तूं ध्यानरूढ। हा मूढ अभिचार॥१०॥ निघालें रावणाचें मडें। कायेसें ध्यानाचें सांकडें। दहाही शिरें पाहें पुढें। म्हणोनि रडे अति दीर्घ॥११॥ रणीं छेदिला दशमुख। मी पावलें परम दुःख। अझून कायसें अभिचारिक। महामूर्ख झालासी॥१२॥ रावणाचें निजशरीर। विदारिती गीध घार। तूं उरलासी ज्येष्ठ कुमर। परी संस्कार न करिसी॥१३॥ सांडून अभिचारविधान। करीं पित्याचें पिंडदान। भंगेना त्याचें ध्यान। होमावदान राहीना॥१४॥

होमकुंडातून रथाचे आगमन : इतुक्या अवसरांत। होमकुंडी अजित रथ। आला वारुंवासहित। तेणें तळमळीत बिभीषण॥१५॥ इंद्रजित न पडे हो दुश्चित। न करवेचि कर्मघात। होमीं प्रकटला साश्व रथ। करील प्राणांत अवघ्यांचा॥१६॥ सप्तावरणें भेदून। राक्षसांसीं करोन रण। यक्षिणीवटमूळ उघडून। अवघे जण येथें आलों॥१७॥ अवघे जण आलों येथ। तो उद्योग गेला व्यर्थ। होमीं प्रकटला रथ। आक्रंदत बिभीषण॥१८॥ भाक देवोनि श्रीरामासी। म्यां आणिलें सौमित्रासी। होमीं प्रकटल्या रथासी। इंद्रजितास न मारवे॥१९॥ रथीं बैसोनि इंद्रजित। करील लक्ष्मणाचा घात। अवघ्यां आला पैं प्राणांत। आक्रंदत बिभीषण॥२०॥ इतुका काळपर्यंत। उगाचि होता हनुमंत। आक्रंदतां शरणागत। काळकृतांत खवळला॥२१॥ तो म्हणे बिभीषणा पैं तूतें। मज निरविलें[2] श्रीरघुनाथें। तुज कोण मारिता येथे। वृथा कां चित्तें भितोसी॥२२॥

हनुमंताने होमकुंडातील रथाला पाताळात दडपला : मारिलिया शरणागत। धिक् जीवित धिक् पुरुषार्थ। ऐसें बोलोनियां हनुमंत। काळकृतांत खवळला॥२३॥ थरकत माथांची पैं शेंडी। वळोनी निजपुच्छाची वेढी। होमकुंडामाजी तांतडीं[3]। घातली उडी हनुमंतें॥२४॥ अश्वशस्त्रेंसीं समवेत। कुंडीं निघत होत रथ। हनुमंतें देवोनि लात। पाताळगत तो केला॥२५॥ सर्वेचि उसळोनि तांतडीं। रागें इंद्रजित आंसुडी। वाचेसी पडली बोबडी। कर्म निर्वडी[4] भंगलें॥२६॥ स्रुवा आंसडोनि कराग्रें। उलंडलीं अशुद्धपात्रें[5]। ख्याति लाविली वायुपुत्रें। निशाचरें हडबडलीं॥२७॥ कर्म न होतां समाप्त। कैसेनि आला हनुमंत। जव पाहे विवरांत। अत्यद्भुत देखिलें॥२८॥ निधडा योद्धा वीर धीर। अचुकसंधानी सौमित्र। सवें वानरांचा भार। वीरीं विवर दाटलें॥२९॥ अति दुर्गम पंथ दारुण। भेदोनियां सप्तावरण। कैसेनि आले अवघे जण। पाहे आपण इंद्रजित॥३०॥ तंव देखिला बिभीषण। आमचें गुह्य गुप्तस्थान। दाखविता हा एक जण। कुळनिर्दळण हा आम्हां॥३१॥ तंव बोलिला हनुमंत। युद्धी इंद्र धरिला जीत। ब्रीदें पढविसी इंद्रजित। तो पुरुषार्थ आजि दावी॥३२॥ ब्रीदें पढविसी इंद्रजित। शेखी[6] लपसी विवरांत। कळला तुझा पुरुषार्थ। कपटी निश्चित अभिचारत्वें॥३३॥ तुजसी करावया रण। निधडा आलासे लक्ष्मण। दावीं आपुली आंगवण। धनुष्या बाण सज्जूनी॥३४॥

उत्तरस्थाविंद्रजिच्छीघ्रमवस्थाप्यैव कर्मकृत्। स तु कर्मण्यनिर्वृत्ते मनः शल्यमिवोद्वहन्॥१॥
रथेनादित्यवर्णेन बलवान्रावणात्मजः। इंद्रजित्कवची खड्गी सध्वजः प्रत्यदृश्यत॥२॥
लक्ष्मणस्तमुवाचाथ रावणिं रघुनंदनः। समाह्वये त्वां संग्रामे सौम्य युद्धं प्रयच्छ मे॥३॥

कर्म न होतां समाप्त। उठतां इंद्रजित तळमळित। होमकुंडी प्रकटतां रथ। केला हताहत

शब्दार्थ : १. साह्य, कैवार, २. स्वाधीन केले, ३. घाईने, ४. समूळ, ५. रक्तपात्रे, ६. शेवटी.

हनुमंतें ॥३५॥ हनुमंताएवढा वैरी। आणिक नाहीं संसारीं। राक्षसांतें भानापरी। करीत बोहरी[1] येथें आला ॥३६॥ याचेनि कर्मभंगें जाण। मज अलोट आलें मरण। आतां सौमित्रासीं रण। करीन निर्वाणसंग्रमा ॥३७॥ संग्राम करावया मर्गळा। सांडोनिया होमबिळा। शीघ्र आला वटमूळा। संमुख पावला सौमित्र ॥३८॥ परतोनि होमबिळाआंत। रिघों नेदी हनुमंत। बीळ आवरोनि समस्त। राहिला कृतांत बिळद्वारीं ॥३९॥ पूर्वील जो कामग[2] रथ। आदित्यतेजें लखलखित। कामग अश्वसंयुक्त। सालंकृत ध्वजेंसीं ॥४०॥ मुकुटकुंडलें मेखळा। वीरकंकणें कंठमाळा। कवच लेइला तो मर्गळा। खड्ग करतळां तुकित ॥४१॥

**इंद्रजिताचें लक्ष्मणाला आव्हान :** ध्वजच्छत्रपताकान्वित। सारथ्यानें आणिला रथ। तेथें बैसला इंद्रजित। रणीं गर्जत साटोपें ॥४२॥ संमुख देखोनि लक्ष्मण। इंद्रजित बोलिला आपण। आम्ही तुम्ही दोघे जण। करूं निर्वाणसंग्राम ॥४३॥ तुझे हातें मज प्राणांत। कां माझेनि हातें तुझा घात। हाचि आजिचा युद्धार्थ। जाण सुनिश्चित सौमित्रा ॥४४॥ ऐसें बोलोनि विस्मित। इंद्रजित स्वयें असे पाहत। क्रमोनियां दुस्तर पंथ। कैसेनि येथ स्वयें आला ॥४५॥ भेदूनियां सप्तावरण। कैसेनि आले वीर दारुण। तंव देखिला बिभीषण। कुळनिर्दळण हा आम्हां ॥४६॥

किं कृतं शाठ्यमच्छिद्रं प्रहरस्यात्मजे मयि। शोच्यस्त्वमसि दुर्बुद्धे निंदनीयश्च साधुभिः ॥४॥
यस्त्वं स्वजनमुत्सृज्य परेषां भृत्यतां गतः। न जातित्वं न सौहार्दं न भ्रातृत्वं न बंधुता ॥५॥
रक्षितं नैव शूरत्वं क्लीबत्वं प्रकटीकृतम् ॥६॥

देखोनिया बिभीषण। कोपें इंद्रजित जाला अग्न। कैसें बोले तो निर्भर्त्सून। अनुलक्षून पितृव्या[3] ॥४७॥ साधुसज्जनसुहृदभावेंसीं। रावणें दिधलें यौवराज्यासी। ज्येष्ठसन्मान सभेसीं। तुज राक्षसीं वंदिजे ॥४८॥ प्रधान आणि सेनाकुमर। केले तुझे आज्ञाधर। तो तूं सांडोनि दशशिर। गेलासी सत्वर श्रीरामा शरण ॥४९॥ जैसा पिता तैसा चुलता। तो तूं मिळोनि रघुनाथा। करावया मज अपत्याचा घाता। गुह्यार्था दाविसी ॥५०॥ सांडून आमचें सुहृदपण। श्रीरामासी रिघोनि शरण। करावया कुळनिर्दळण। वर्मे संपूर्ण सांगसी ॥५१॥ दांडा जन्मोनि वृक्षावरी। मिळोनि कुऱ्हाडीमाझारी। तो कुळाचाचि छेद करी। तैशापरी तूं येथें ॥५२॥ नाहीं राखिला जातिधर्म। नाहीं राखिला कुळानुक्रम। साधूंमाजी तूं पापी परम। निंद्य जन्म पैं तुझा ॥५३॥ सांडून यौवराज्यासीं आगळिक। जालासी श्रीरामाचा सेवक। शठ नष्ट तूं नपुंसक। परम दांभिक साधुत्वें ॥५४॥

कुद्धेनेंद्रजिता वाक्यं पुरुषं रावणानुजः। इत्युक्तो भ्रातृपुत्रेण प्रत्युवाच बिभीषणः ॥७॥
अजानन्निव मच्छीलं किं त्वमेवं ब्रवीषि माम्। राक्षसेंद्रसुतानार्य पारुष्यं त्यज गौरवात् ॥८॥
परोपि हितवान्बंधुर्बंधुरप्यहिते रतः। अहितो देहजो व्याधिर्हितमारण्यमौषधम् ॥९॥
परस्वानां च हरणं परदाराभिमर्षणम्। सुहृदामपि संकोपस्त्रयो दोषाः क्षयावहाः ॥१०॥

**बिभीषणाचे प्रत्युत्तर :** इंद्रजिताचें निंद्य वचन। ऐकोनियां बिभीषण। काय बोलिला आपण। धर्मवचन धर्मात्मा ॥५५॥ ऐक बापा इंद्रजिता। तुज कळलीसे माझी शीळता[4]। जाणोनि निंदिसी कां वृथा। दुर्मदता[5] साभिमानें ॥५६॥ तुज संग्रामीं नाहीं बळ। नष्ट कपटी तूं केवळ। अभिचार[6] हें तुझें शीळ। पापी प्रबळ तूं एक ॥५७॥ करोनियां अभिचारता। मारूं पाहसी श्रीरघुनाथा। तुझा साक्षेपें घात करितां। पाप सर्वथा असेना ॥५८॥ परद्रव्याचें ज्यासी हरण। परदाराभिलाषण। सुहृदांचा द्वेष पूर्ण। तेथें मरण सहजचि ॥५९॥ सीताभिलाषें

शब्दार्थ : १. नाश, २. इच्छेकरून जाणारा, ३. आपल्या चुलत्याला, ४. स्वभाव, ५. मदांध होऊन. ६. जारणमारण.

हताहत। पापें निमालेत समस्त। तुम्हांसी तुम्हीं केला घात। आत्मा रघुनाथ द्वेषितां॥६०॥ सखा बंधु करी अनहितें। तोचि वैरी पैं निश्चित। निरपराध जो हितान्वित। तो परम आप्त निजसखा॥६१॥ अहित देहींचा देहज व्याधी। जो कां आपला आपण बाधी। हित अरण्यस्थ ओषधी। जे आधिव्याधिच्छेदक॥६२॥ तेंवी आप्त तुम्ही उन्मादता। मज हाणोनियां लाथा। केलें माझिया स्वहिता। शरण रघुनाथा धाडिलें॥६३॥ परदारपरद्रव्यहरण। या पापे बुडाला रावण। तुम्ही अवघे पापी पूर्ण। पावाल मरण निजपापें॥६४॥

बिभीषणवचः श्रुत्वा रावणिः क्रोधमूर्च्छितः। अब्रवीत्परुषं वाक्यं स्मयन्हेत्वर्थसंयुतम्॥११॥
प्रागेव विश्वविजयी न निषेधयिता मम। यदा जहार रत्नानि भुवनेभ्योऽखिलान्यपि॥१२॥
तदा त्वमपि रत्नानां भागभागभवः स्वयम्। निहतं वालिनं दृष्ट्वा सुग्रीवमभिषोचितम्॥१३॥
त्वया तद्राज्यलुब्धेन दुरात्मन्समनुष्ठितम्॥१४॥

इंद्रजिताची घोषणा : बिभीषणाचें निजवचन। धर्मार्थरूप अति तीक्ष्ण। तेणें इंदजित क्षोभोन काय आपण बोलत॥६५॥ त्रिभुवनींच्या संपत्ती। हरूनि आणी लंकापती। वांटा घेसी हातोहाती। उल्लास चित्तीं मानिसी॥६६॥ वांटा घेसी हातोहतीं। उल्लास चित्तीं मानिसी॥६६॥ वांटा घेतां आपण। परद्रव्यापहरण। न म्हणसीच पापाचरण। शठ संपूर्ण तूं एक॥६७॥ छेदोनियां वाळीचा कंठ। सुग्रीवा केला राज्यपट। तेंवी राज्यलोभें तूं कपटी नष्ट। श्रीरामीं वरिष्ठ शरणागत॥६८॥ बिभीषण भला साधुसंत। ऐसा पवाडा[1] विख्यात। शेखीं राज्यलोभीं ठेवोनि चित्त। शरणागत श्रीरामीं॥६९॥ इंद्रजित स्वमुखें आपण। निंदितां बिभीषण। तें देखोनि लक्ष्मण। आला आपण साटोपें[2]॥७०॥ सज्जोनियां धनुष्यबाण। मांडून माहेश्वरी[3] ठाण[3]। घ्यावया इंद्रजिताचा प्राण। आला लक्ष्मण साटोपें॥७१॥ संमुख देखानि लक्ष्मण। इंद्रजित गर्जे आपण। मजसीं करावया रण। आंगवण तुम्हां केंची॥७२॥

इन्द्रजिद्धनुरादाय शरांश्चाशीविषोपमान्। उवाच चेदं संरब्धः सौमित्रिं स बिभीषणम्॥१५॥
तांश्च वानरशार्दूलान्पश्यध्वं मत्पराक्रमम्। अद्य वो मामका बाणा महाकार्मुकनिःसृता॥१६॥
गात्राणि विधमिष्यंति तूलराशिमिवानलः। अद्य वो गमयिष्यामि सर्वानेव यमक्षयम्॥१७॥

धनुष्यासीं घालोनि हात। इंद्रजित रणरंगी गर्जत। तुम्ही जे जे आलेति येथ। तुम्हां प्राणांत माझेनि॥७३॥ लक्ष्मण आणि बिभीषण। प्रथम यांचा घेईन प्राण। हनुमान वज्रदेही मारीन। निर्वाणबाण विंधोनी॥७४॥ अंगद नळ नीळ जांबवंत। आणिक वानर समस्त। बाणीं करोनि क्षतविक्षत। मारीन येथ संग्रामीं॥७५॥ माझे धनुष्याचा बाण। व्यर्थ न वचे पैं जाण। घेईन अवघियांचा प्राण। रणनिर्वाण हें माझें॥७६॥ राम लक्ष्मण तुम्ही दोन्ही। दोन वेळां शरबंधनी। घोळसिले रणांगणीं। तेंही विसरोनी आलेती॥७७॥

तच्छुत्वा रावणेर्वाक्यं गर्वितं लक्ष्मणस्तदा। अभ्यधावत्सुसंक्रुद्धो राक्षसं वाक्यमब्रवीत्॥१८॥
न वाचां दुर्गमं पारं कार्याणां राक्षसाधम। वाचा व्याहृत्य जानीषे कृतार्थोऽस्मीति दुर्मति॥१९॥
अंतर्ध्यानगतेनावां यत्त्वयाभिहतौ रणे। तस्कराचरितो मार्गो यः स शूरैर्न सेवितः॥२०॥
तदाहवपथे प्राप्य स्थितोऽह तव राक्षस। दर्शयस्वाद्य यत्तेजो वाचा किं बहु कत्थसे॥२१॥

लक्ष्मणाचे इंद्रजिताला उपहासगर्भ भाषणः इंद्रजिताचे ऐसे वाक्यार्थ। ऐकोनियां गर्वान्वित। लक्ष्मण बोले उपहासत। गर्वहत करावया॥७८॥ वाचेचे बाणप्रहारीं। कोणीं मारिले नाहीं वैरी। तुझ्या शूरत्वाची थोरी। जे बोलवरी वाढिव[4]॥७९॥ शूराचें मुख्य लक्षण। करोनियां दाविती रण। तूं तंव तोंडभांड[5] जाण। भंडपुराण वाढीव॥८०॥ बडबडेची आंगवण। तुझे

---

शब्दार्थ : १. पराक्रम, २. आवेशाने, ३. आसनविशेष, ४. पराक्रम, ५. नुसती बडबड करणारा.

ठायीं दिसे संपूर्ण। संमुख न करवे रण। जासी पळोन कपटत्वें ॥८१॥ अंधारीं लपोनि आपण। आम्हांसी केलें शरबंधन। तो तंव चोरीचा मार्ग जाण। नव्हे लक्षण शूराचें ॥८२॥ संमुख करावया संग्रामता। तुज नाहीं सामर्थ्यता। मारून मायेची[1] सीता। विवराआंतौता लपसी तूं ॥८३॥ अतिकाय मकराक्ष जाण। संमुख करोनियां रण। क्षात्रधर्में दिधला प्राण। कपटी संपूर्ण तूं एक ॥८४॥ ज्यासीं लाविलें शरबंधन। तो मी आलों स्वयें लक्ष्मण। करोनि दावीं आंगवण। बडबडोन काम काय ॥८५॥

एवमुक्तो धनुर्भीमं परामृश्य महाबलः। विससर्ज शितान्बाणानिंद्रजित्समितिंजयः ॥२२॥
तदोत्सृष्टा बलवता शरास्तीक्ष्णा विषोपमाः। संप्राप्य लक्ष्मणं पेतुः श्वसन्त इव पन्नगाः ॥२३॥
सशरौघैश्च विद्धांगो रुधिरेण च भूषितः। शुशुभे लक्ष्मणः श्रीमान्विधूम इव पावकः ॥२४॥
इन्द्रजित्त्वात्मनः कर्म प्रसमीक्ष्याथ राक्षसः। विनद्य च महानादमिदं वचनमब्रवीत् ॥२५॥
अद्य मत्कार्मुकोत्सृष्टाः शरास्तीक्ष्णाः सुपत्रिणः। आदास्यंति शरीरात्ते जीवितं जीवितच्छिदः ॥२६॥

ऐकोनि लक्ष्मणाचें वचन। इंद्रजित अति कोपायमान। उग्र शरचाप सज्जून। तीक्ष्ण बाण विंधिले ॥८६॥ जैसे धुंधुवात विखार[2]। तैसें सोडिले उग्र शर। ओरखडोनियां शरीर। वाहे रुधिर सौमित्रा ॥८७॥ अभेद्यकवची[3] श्रीलक्ष्मण। त्यास भेदूं न शकती बाण। रुधिरोक्षित शोभायमान। रणगर्जन राक्षसां ॥८८॥ सर्वांगीं वाहतां रुधिर। जैसा तेजस्वी वैश्वानर[4]। तैसा शोभतसे सौमित्र। निशाचरचरणमर्दी ॥८९॥ देखोनि लक्ष्मणाचें रुधिर। इंद्रजित म्हणे मी योद्धा थोर। बाणीं भेदला सौमित्र। गर्जे थोर सिंहनादें ॥९०॥ जे जे तुम्ही आलेति येथ। ते बाणीं भेदोनि समस्त। सौमित्रेंसी समवेत। जीवितांत करीन ॥९१॥ माझे सुवर्णपत्राचे बाण। घेतील अवघ्यांचा प्राण। ऐकोनि इंद्रजितगर्जन। काय लक्ष्मण बोलत ॥९२॥ नाहीं आंगवण गाढी। नुसती बोलाची प्रौढी। काय जिंतिलें रणनिर्वडीं। उभवोनि गुढी गर्जसी ॥९३॥

इत्युक्त्वा पंचपर्वाणमाकर्णापूरितं शरम्। निचखान महावेगं लक्ष्मणो रावणात्मजम् ॥२७॥
स शरेणाहतस्तेन सरोषो रावणात्मजः। सुप्रमुक्तैः शितैर्बाणैः प्रतिविव्याध लक्ष्मणम् ॥२८॥
स बभूव महाभीमो नरराक्षससिंहयोः। विमर्दस्तुमुलो युद्धे परस्परवधैषिणोः ॥२९॥

इंद्रजित - लक्ष्मण - द्वंद्व : इंद्रजितगर्वितगर्जन। ऐकोनि स्वयें लक्ष्मण। घेवोनि पंचपर्वीं बाण। विंधी आपर साटोपें ॥९४॥ लक्ष्मणें रणनिर्वडीं। शर चाप जोडोनि जोडी। ओढी आकर्ण कानाडी[5]। प्रतापप्रौढीं साटोपें ॥९५॥ अभेद्य कवच भेदूनि जाण। लागतां लक्ष्मणाचा बाण। घायें इंद्रजित तळमळून। अमित बाण वर्षला ॥९६॥ येतां इंद्रजिताचे शर। सौमित्र सोडी बाण अनिवार। दोघे जण महाशूर। अति दुर्धर संग्रामीं ॥९७॥ लघुलाघवी अति चपळ। दोघे वर्षती शरजाळ। नर राक्षस सिंह शार्दुळ[6]। दोघे कुशळ संग्रामी ॥९८॥ वर्मीं विंधोनियां बाण। येरयेरांचा[7] घ्यावा प्राण। टपताती दोघे जण। रणप्रवीण रणयोद्धे ॥९९॥

उभौ हि बलसंपन्नावुभौ विक्रमशालिनौ। उभावपि च विख्यातौ सर्वशस्त्रास्त्रकोविदौ ॥३०॥
उभौ परमदुर्धर्षावुभौ परमतेजसौ। युयुधाते महात्मानौ व्याघ्रकेसरिणाविव ॥३१॥
भूतैर्बहुमिराकाशं विस्मितैरावृतं बभौ। ऋषयः पितरो देवा गंधर्वा गरुडोरगाः ॥३२॥
शतक्रतुं पुरस्कृत्यं ररक्षुर्लक्ष्मणं रणे ॥३३॥

दोघे जण बळवंत। दोघे जण अति विख्यात। दोघे जण प्रतापवंत। दोघे समर्थ संग्रामी ॥१००॥ दोघे धनुर्विद्यानिपुण। दोघे शस्त्रास्त्रप्रवीण। लघुलाघवी दोघे जण। दुर्धर रण दोघांचें ॥१॥ दोघे जण महावीर। दोघे जण महाशूर। दोघे जण परम धीर। दोघे दुर्धर

---

**शब्दार्थ :** १. लटकी, खोटी, २. सर्प, ३. अभेद्य कवच घातलेला, ४. अग्नी, ५. धनुष्याची दोरी, ६. वाघ, ७. परस्परांचा.

संग्रामीं ॥२॥ दोघां बाढीव प्रसिद्ध । दोघां नाहीं श्रमस्वेद। दोघां चढला रणमद । दोघे सन्नद्ध संग्रामीं ॥३॥ एक केवळ सत्वस्थिती। एक केवळ कपटमूर्ती। एकामाजी अगाध शांती। एक छळणोक्तीं निपुण॥४॥ दोघांचेहीं युद्ध दुर्धर। पाहूं आले सुरवर। यक्ष गंधर्व किन्नर। विद्याधर किंपुरुष[१] ॥५॥ दैत्य दानव मानव पितर। देव ऋषी सनत्कुमार। युद्धा पाहूं आला इंद्र। वरुण कुबेर यम सोम॥६॥ ब्रह्मा आला अति सत्वर। पाहूं आला युद्ध दुर्धर। उमेसहित[२] श्रीशंकर। सहपरिवार भूतगणीं॥७॥ रणीं रक्षावया सौमित्र। अवघें आले पैं सत्वर। विमानीं दाटले अंबर। विजयमंत्र ऋषींचें॥८॥ लक्ष्मण देखोनि दुर्धर। रणीं क्षोभला निशाचर। अनुलक्षोनि सौमित्र। काय उत्तर बोलत॥९॥

अद्य ते दर्शयिष्यामि तिष्ठेदानीं स्थिरो भव। इत्युक्त्वा सप्तभिर्बाणैरभिविव्याध लक्ष्मणम् ॥३४॥
दशभिश्च हनूमंतं तीक्ष्णधारैः शरोत्तमैः। ततः शरशतेनैव सुप्रयुक्तेन वीर्यवान् ॥३५॥
क्रोधाद्द्विगुणसंरंभं निर्बिभेद बिभीषणम्। स दृष्ट्वा राक्षसेंद्रस्य कर्म रामानुजस्तदा॥३६॥
अचिंतयित्वा प्रहसन्नैतत्किंचिदपि ब्रुवन्। अब्रवीच्च शरन्घोरानुद्यम्य नरपुंगवः॥३७॥
लघवश्चाल्पवीर्याश्च शरा हीमे सुखास्तव॥३८॥

इंद्रजितें करूनि गर्जन। विंधिला सात बाणीं लक्ष्मण। हनुमंतासीं दहा बाण। अति दारुण विंधिले॥११०॥ मारावया बिभीषण। पोटांतून क्रोध दारुण। विंधिले शतानुशत बाण। घ्यावया जाण प्राण त्याचा॥११॥ इंद्रजिताचे सर्व बाण। येतां देखोनि लक्ष्मण। वरच्यावरी तोडी आपण। बिभीषण रक्षावया॥१२॥ छेदूनि इंद्रजिताचे बाण। त्याही कर्माचा अभिमान। स्वमुखें न वदे लक्ष्मण। गंभीर पूर्ण संग्रामीं॥१३॥ बिभीषण शरणागत। कोणी लावितांचि हात। त्याचा करावया घात। सावचित्त सौमित्र॥१४॥ इंद्रजिताप्रति लक्ष्मण। स्वयें सांगताहे आपण। पुण्यप्राय[३] लागती बाण। आंगवण तुज नाहीं॥१५॥ कपटें भस्म शौर्यवृत्ती। नाहीं सामर्थ्य ना शक्ती। रणीं वल्गसी[४] किती। निर्लज्ज निश्चितीं तूं एक॥१६॥ ऐसें बोलोनि लक्ष्मण। घ्यावया इंद्रजिताचा प्राण। दुर्धर विंधिले पैं बाण। रणविंदान[५] लघुहस्तें॥१७॥

तस्य बाणैरपध्वस्तं कवचं कांचनं महत्। व्यशीर्यत रथोपस्थे ताराजालमिवांबरात्॥३९॥
निकृत्तवर्मा नाराचैर्बभूव स कृतव्रणः। इंद्रजित्समरे शूरः सर्वतो रुधिरोक्षितः॥४०॥
स शक्रासनसंस्पर्शैर्लक्ष्मणेन हतः शरैः। मुहूर्तमभवन्मूढः सर्वतः क्षुभितेंद्रियः॥४१॥
उपलभ्य मुहूर्तेन संज्ञां प्रत्यागतेंद्रियः। ददर्शावस्थितं वीरमाजौ दशरथात्मजम्॥४२॥

लक्ष्मणाच्या बाणाने इंद्रजिताला मूर्च्छा : इंद्रजित रथगत आपण। त्यासीं लक्ष्मणें विंधोन बाण। हेमकवच शोभयमान। पाडिलें छेदून रणभूमीं॥१८॥ वर्षेनिया शरजाळीं । घायें कवचा केली रांगोळी। शोभे लखलखित भूतळीं। नभोमंडळी जेंवी तारा॥१९॥ कवच छेदोनि सत्वर। निधडा इंद्रजित झुंजार[६]। घायवट[७] केला जर्जर। वाहे रुधिर सर्वांगीं॥१२०॥ वज्रप्राय दुर्धरशर। वर्मीं विंधितां सौमित्र। मूर्च्छित पडला निशाचर। महावीर इंद्रजित॥२१॥ घायें लागली अर्धचंद्री । प्राण पांगुळला शरीरीं। इंद्रियें तटस्थ व्यापारीं। धरेवरी पाडिला॥२२॥ चेतना लपाली अंतरीं। आठव नाठवे शरीरीं। मूढमति धरेवरी[८]। घटका चारी मूर्च्छित॥२३॥ उपलब्धि[९] येतां जाण। इंद्रजित होतां सावधान। भोंवतें पाहे आपण देखे लक्ष्मण रणरंगी॥२४॥

सावध झाल्यावर इंद्रजिताचे पुन्हा युद्ध सुरू : हातीं वाहोनियां मेढा[१]। अंतका अंतक निधडा । महाकाळाचा संवगडा। देखिला पुढां सौमित्र॥२५॥ लक्ष्मणाचा खटाटोप। देखोनि युद्धाचा

शब्दार्थ : १. गंधर्वविशेष, २. पार्वतीसह, ३. फुलांप्रमाणे, ४. बडबडतोस, ५. रणकौशल्य, ६. लढवय्या, ७. जखमी, ८. पृथ्वीसह, ९. शुद्धी.

साटोप। इंद्रजितासी आला कंप। रणाभिदर्प मावळला॥२६॥ निधडा देखोनि लक्ष्मण। इंद्रजित जाला कंपायमान। पावोनियां अंतर्धान। करावया छळण विचारी॥२७॥ करावया लक्ष्मणासीं छळण। इंद्रजित वर्षे अमित बाण। तैसेच वर्षे लक्ष्मण। बाणीं गगन व्यापिलें॥२८॥

तौ प्रयुक्तौ पुनर्वीरौ रणे लक्ष्मणराक्षसौ। शरवर्षं हि वर्षतौ जघ्नतुस्तौ परस्परम्॥४३॥

इन्द्रजिल्लक्ष्मणश्चैव परस्परजयैषिणौ। चक्रतुस्तुमुलं घोरं सन्निपातं मुहुर्मुहुः॥४४॥

पुढती दोघे महावीर। नरशूर निशाचर। युद्धा मिसळले सत्वर। दुर्धर शर वर्षोनी॥२९॥ बाण वर्षतां दोघां वीरां। रणीं उठला रणधुळोरा। बाणीं खिळिली धरा[१]। बाणीं अंबरा व्यापिलें॥१३०॥ बाण कोंदले दश दिशांत। बाणीं व्यापिले दिगंत। आच्छादिले चंद्रादित्य। दोघे उन्मत्त रणमारें॥३१॥ साधकता बाधकता युद्धस्थितीं। रणमारका माराच्या युक्ती। दोघां धनुर्विद्याव्युत्पत्ती[२]। दोघे भिडती निःशंक॥३२॥ येरयेरांचा करावया घात। शस्त्रास्त्रीं मिरवत हस्त। शस्त्री शस्त्रांचा निःपात। वीर क्रंदनार्थ करिताती॥३३॥

**मेघपृष्ठाच्या आडून इंद्रजिताचा कपटाने लक्ष्मणावर हल्ला :** लक्ष्मण वीर रणोन्मत्त। निधडा याचा पुरुषार्थ। जाणोनियां इंद्रजित। निजकपटार्थ मांडिला॥३४॥ बाणीं झांकिले रविकर[३]। रणीं पडतां अंधार। गुप्त केला रहंवर। अश्वयंत्यांसमवेत[४]॥३५॥ मेघ जिणोनि विविध। नांव पावला मेघनाद। त्यांचे पृष्ठावरी सन्नद्ध। बाण सुबद्ध विंधित॥३६॥ इंद्रजित जावोनि मेघपृष्ठीं। दुर्धर वर्षे बाणवृष्टी। लक्ष्मण मारीन उठाउठीं। वानरकोटीसमवेत॥३७॥ जेणें मार्गे आलेति येथ। तो बाणें आच्छादिला लंकापथ। पावों न शका रघुनाथ। तुम्हां प्राणांत माझेनि॥३८॥ खुंटली श्रीरामाची भेटी। खुंटली श्रीरामासीं गोष्टी। येथें माझिया बाणवृष्टीं। उठाउठीं मराल॥३९॥ ऐकतां इंद्रजिताचें गर्जन। आक्रंदला बिभीषण। निशाचरें केलें छळण। गेला निघोन मेघपृष्ठीं॥१४०॥ निधडा वीर लक्ष्मण। घायें त्याचा घेतला प्राण। युद्धासंधीं करोनि छळण। गेला निघोन मेघपृष्ठीं॥४१॥ तेथें न चले अनुसंधान। त्याचे आम्हां लागती बाण। कैसेनि वांचेल लक्ष्मण। बिभीषण आक्रंदे॥४२॥

**लक्ष्मणासह हनुमंत इंद्रजितासमोर आला :** सौमित्रासीं रणाभिघात। वानर मारील समस्त। आम्हांसी आला प्राणांत। आक्रंदत बिभीषण॥४३॥ आक्रंदता बिभीषण। आले हनुमंता स्फुरण। शरणागता आलें मरण। धिक् आंगवण पैं माझी॥४४॥ माझेनि भरंवसें जाण। शरणागत बिभीषण। आणि लक्ष्मण धाडिले॥४५॥ जीवें जीता[५] मी स्वयें श्रीरामें आपण। शरणागत बिभीषण। आणि लक्ष्मण धाडिले॥४५॥ जीवें जीता मी हनुमंत। कोण करूं शके घात। आश्वासोनि शरणागत। रणीं गर्जत साटोपें॥४६॥ इंद्रजित केवळ कपटमूर्ती। त्याचें बळ तें छळणोक्ती। यालागीं आक्रंदसी किती। क्षणानुवृत्तीं[६] मारीन॥४७॥ करावया इंद्रजिताची शांती। लक्ष्मणा वाहोनियां हातीं। वेगें वाढला मारुती। दुर्धर वृत्ती अत्युग्र॥४८॥ तळहातीं वाहोनियां जाण। जेथून इंद्रजित विंधी बाण। तेथें आणोनि लक्ष्मण। केलें गर्जन हनुमंतें॥४९॥ ऐकोनि हनुमंतगजर। प्रत्यक्ष देखोनि वानर। येथेंही आणिला सौमित्र। निशाचर दचकला॥१५०॥ एका जनार्दना शरण। इंद्रजित लक्ष्मण। दोघे करिती निर्वाण। सावधान अवधारा॥ ॥१५१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे एकाकारटीकायां इंद्रजिन्मेघपृष्ठगमनं नाम अष्टत्रिंशत्तमोऽध्यायः॥३८॥ ओंव्या॥११५॥ श्लोक॥४४॥ एवं ॥१९५॥

---

**शब्दार्थ :** १. धनुष्य, २. धनुर्विद्येचे कौशल्य, ३. सूर्याचे किरण, ४. घोडे व सारथी यांसह, ५. जिवंत, ६. क्षणाच्या अवकाशात.

# अध्याय एकूणचाळिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## इंद्रजिताचा वध

लक्ष्मण व वानरसैन्यासह हनुमंत मेघपृष्ठी गेला : इंद्रजित जातां मेघपृष्ठी। हनुमान त्याची न सांडी पाठी। निर्दळावया महाकपटी। उठाउठी पावला॥१॥ करावया इंद्रजिताचा घात। लक्ष्मण घेवोनियां हातांत। वेगें वाढला हनुमंत। मेघापर्यंत साटोपें॥२॥ वानरसैन्यासमवेत। तळीं असतां शरणागत। छळणें इंद्रजित करी घात। रक्षणार्थ कपि योजी॥३॥ बिभीषण लक्ष्मण। आणि समस्त वानरगण। लोम[1] तुटों नेदीं जाण। आंगवण पहा माझी॥४॥ पुच्छाचिया आंकोड्याआंत। वानर आणि शरणागत। बैसवोनियां समस्त। वज्रकवचात राखिले॥५॥ येरीकडे[2] हनुमंत। करावया इंद्रजिताचा घात। खवळला रणाआंत। तोही वृत्तांत अवधारा॥६॥ ठाणमाण धनुष्यबाण। कपिकराग्रीं लक्ष्मण। अंगी आदळतां जाण। इंद्रजित पूर्ण हडबडिला॥७॥ कैसेनि आला पैं हा येथ। घेवोनि आला हनुमंत। तें देखोनि इंद्रजित। चळी कांपत अति धाकें॥८॥ कायसें बापुडें लक्ष्मण। निधडी कपीची आंगवण। मजसीं करावया रण। आणिला आपण सौमित्र॥९॥ सुरनरां अगम्य पूर्ण। तें हें माझें गुप्तस्थान। तेथेंही आणिला लक्ष्मण। वैरी पूर्ण हनुमंत॥१०॥ इंद्रजितासी म्हणे लक्ष्मण। सांडून पळालासी रण। कपटें करावें छळण। हेचि आंगवण तुजपासीं॥११॥ इंद्र जिंतिला म्हणविसी। शेखीं संग्रामी पळसी। लाज नाहीं तुजसी। येवोनि लपसीं दुर्गमीं[3]॥१२॥ हनुमंताचा निजधर्म। दुर्गम तें तें आम्हां सुगम[4]। ऊठ वरता करीं संग्राम। इंद्रजित परम निखंदिला[5]॥१३॥ वर्मीं खोंचला निशाचर। कांहीं न देववे उत्तर। सज्जोनियां चाप शर। युद्धा सत्वर मिसळला॥१४॥ त्यासीं करावया रण। संमुख चालिला लक्ष्मण। धनुष्या वाहोनयां गुण[6]। निर्वाणबाण सज्जिले॥१५॥ एक गज एक केसरी। एक नर एक नरहरी। एक मुरु एक मुरारी। ऐसियापरी मिसळले॥१६॥ एक सर्प एक सर्पारी। एक त्रिपुरी एका त्रिपुरारी। एक शंबर एक शंबरारी। ऐसियापरी मिसळले॥१७॥ दोघांचेंही शरजाळ। सुटतां व्यापिलें अंतराळ[7]। बाणीं खिळलें भूतळ। दोघे चपळ लघुहस्तें॥१८॥ येरयेरांचा प्राणांत। करावया खवळले अत्यद्भुत। वर्में कर्में घात पात। घाय हाणित लघुवेगें॥१९॥ दोघे वीर संग्रामश्रेष्ठ। शस्त्रास्त्रवेत्ते अति वरिष्ठ। दोघें वीर भट सुभट। रणसंनिष्ठ साटोपें॥२०॥ इंद्रजिताचे दुर्धर बाण। लक्ष्मणें केले तृणासमान। सौमित्राचे शर दारुण। सर्वांगीं पूर्ण खडतरले॥२१॥ जेंवी तृणांकुर गिरीवर। तेंवी बाणीं खिळिला निशाचर। सर्वांगीं वाहे रुधिर। इंद्रजित थोर हडबडिला॥२२॥ इंद्रजिताची शौर्यशक्ती। शस्त्रास्त्ररणव्युत्पत्ती। लक्ष्मणें नेली भस्मांतीं। संग्रामी ख्याती लावोनी॥२३॥ सौमित्र योद्धा अति दारुण। संमुख भिडतां घेईल प्राण। त्यासीं करावया छळण। मांडिलें विंदान कपटाचें॥२४॥ रथ सारथी नभोगत[8]। स्वयें संग्रामीं करोनि गुप्त। अदृश्यगतीं बाण विंधित। अतर्क्यघात संग्रामीं॥२५॥

हनुमंतापुढे इंद्रजिताचे कपट निष्फळ ठरते : मारावया बिभीषण। गुप्तगतीं विंधी बाण। हनुमान नित्य सावधान। सांडिले छेदून पुच्छाग्रीं॥२६॥ लांगूलवज्रकवचाआंत[9]। हनुमंते राखिले स्वस्थ। न चले बिभीषणासीं घात। तळमळित इंद्रजित॥२७॥ मुख्य वैरी हनुमंत।

---

शब्दार्थ : १. केस, २. दुसरीकडे, ३. अवघड जागी, ४. सोपे, ५. निर्भर्त्सना केली, उपहास केला, ६. दोरी, ७. आकाश, ८. आकाशस्थ, ९. लांगूल=पुच्छ.

त्याचा करावया नि:पात। सारथी धांविन्नला गुप्त। गदाघात हाणावया ॥२८॥ गदा हाणितां आतुर्बळी। घायें गदा जाली रांगोळी। सारथी आदळला भूतळीं। अति तळमळी आघातें ॥२९॥ हनुमंतें हाणितां लाथ। सवेग सारथी जाला गुप्त। पळोनि गेला रथाआंत। भाग्यें प्राणांत चुकला ॥३०॥ मारावया हनुमंत। सारथी होवोनि गेला गुप्त। लक्ष्मण झोंबला संग्रामांत। करावया घात सारथ्याचा ॥३१॥ लक्ष्मण आणि हनुमंत। दोघे क्षोभले रणांत। इंद्रजितानें केला छळणार्थ। तोही वृत्तांत अवधारा ॥३२॥ रथ घडघडी पश्चिमेसीं। वारू हिंसती उत्तरेसीं। बाण विंधित दक्षिणेसीं। करी पूर्वेसीं सिंहनाद ॥३३॥ कपटी इंद्रजित संग्रामांत। कांही केल्या नव्हे अभिव्यक्त[१]। लक्ष्मण होता चिंताग्रस्त। तेणें हनुमंत क्षोभला ॥३४॥ पुच्छ तळपतां आकाशीं। रथ आकळिला वारूवेंसीं[२]। छळणें पळणें सिंतरावयासी[३]। कपिपुच्छेंसीं चालेना ॥३५॥ अति गुप्तत्वें गगनाआंत। विद्युत्प्राय जो तळपे रथ। तो पुच्छाग्रें बांधोनि हनुमंत। केला अभिव्यक्त संग्रामीं ॥३६॥ खुंटलें इंद्रजिताचें छळणें। खुंटलें रथाचें पळणें। खुंटले आभिचारिक करणे। खुंटलें जाणें यज्ञवाटा ॥३७॥ खुंटलें दशमुख देखणें। खुटलें लंकेमाजी जाणें। खुंटले जीवितेंसीं जिणें। ऐसें करणें कपिपुच्छें ॥३८॥ मुख्य वैरी हनुमंत। इंद्रजित वज्रघाय हाणित। वज्र भंगोनि लचके हात। मग कुंथत संग्रामीं ॥३९॥ माझ्या निजवज्राचा घात। करिता मुख्य हनुमंत। त्यासी न चले घातपात। इंद्रजित अति दु:खी ॥४०॥ येथून खुंटली यज्ञवाट। खुंटली लंकेची निजवाट। देखणें ठेलें दशकंठ। पुच्छाग्रें स्पष्ट बांधलों ॥४१॥ मोकळा असता माझा रथ। तरी मी जातों हातोहात। हनुमंतें बांधिलो येथ। रणप्राणांत कपिपुच्छें ॥४२॥ इंद्रजित होतां चिंतामग्न। येरीकडे[४] लक्ष्मण। सज्जोनियां धनुष्यबाण। आला आपण संग्रामा ॥४३॥ अनुलक्षोनि निशाचर। उपहासें बोले सौमित्र। संग्रामशीळ अति गंभीर। वाक्य खडतर अनुवादे ॥४४॥ वीर शूर मिरविसी ख्याती। शेखीं लपसी अव्यक्तीं। संग्रामशीळ तें छळणोक्ती। कपटमूर्ति महापापी ॥४५॥ ऐसें बोलोनि आपण। रथ छेदावया जाण। बाण घेतला अति कठिण। अति दारुण अनिवार्य ॥४६॥

अथ राक्षससिंहस्य कालान्कनकभूषणान्। शरैश्चतुर्भि: सौमित्रिर्विव्याध चतुरो हयान्॥१॥
धनुर्मेघप्रसूतेन यंतुर्जीवितमाददे। सयंतरि महातेजा निहते रावणात्मजे॥२॥
प्रजहौ च समुद्धर्षं विवर्णश्च बभूव ह। विषण्णवदनं दृष्ट्वा रावणिं हरियूथपा:॥३॥
प्रहर्षमतुलं गत्वा रथमस्य व्यपोथयन्॥४॥

इंद्रजिताच्या अश्वसारथ्यांचे लक्ष्मणाकडून वध: छेदावया इंद्रजिताचा रथ। बाण कनकपत्री सुशोभित। प्रतापतेजें झगझगित। स्वयें विंधित सौमित्र ॥४७॥ त्याचें करावया निवारण। इंद्रजित विंधी अमित बाण। परी तो अनिवार दारुण। अणुप्रमाण ढळेना ॥४८॥ चहूं बाणांचा मार। देखोनियां अनिवार। इंद्रजित सांडितां रहंवर। चाऱ्ही वारू मारिले ॥४९॥ वारू पडतांचि क्षितीं। सवेग मारावया सारथी। सौमित्रें बाण सज्जिला सीतीं[५]। साटोपवृत्ति सन्नद्ध ॥५०॥ इंद्रचापासमान चाप। बाण सज्जिला काळकल्प। देखोनि सारथ्या महाकंप। कपटानुरूप छळच्छद्मी ॥५१॥ सारथी मायालघुलाघवें। सवेग जंव पळून जावें। तंव कपिपुच्छें बांधिला पाहें। ढळो न लाहे सर्वथा ॥५२॥ कपिपुच्छें हातपायीं। बांधले हें दिसत नाहीं। ढळों नेदी ठायींच्या ठायीं। केलें कायी लक्षेना ॥५३॥ सारथी पाताळीं रिघतां। कपिपुच्छें ओढिजे वरता। सवेग आकाशीं गुप्त होतां। वाजती माथां पुच्छाग्रटोले[६] ॥५४॥ तंव लक्ष्मणाचा बाण। घेऊं सरला त्याचा प्राण। सारथी पडतांचि जाण। करी रुदन इंद्रजित ॥५५॥ होतां

शब्दार्थ : १. दृष्टिगोचर, २. घोड्यांसह, ३. फसविण्यात, ४.दुसरीकडे, ५. दोरीवर, ६. शेपटीच्या शेवटाचे सपाटे.

सारथ्याचा घात। माझा बुडाला पुरुषार्थ। ऐसा इंद्रजित तळमळित। दुःखभिभूत अति दुःखी।।५६।। गेली वाढीव[1] गेलें वीर्य। गेली शक्ति गेलें शौर्य । गेलें संग्रामऔदार्य। रणीं धैर्य न धरवे।।५७।। दुःख दाटलें दारुण। अश्रुधारा स्रवती नयन। इंद्रजित होतां दीनवदन। वानरगण उल्लासती।।५८।। इंद्रजित होतां दुःखाभिभूत। वानरवीर जे समस्त। तिहीं भांगिला त्याचा रथ। नामे गर्जत स्वानंदें।।५९।।

इंद्रजित-लक्ष्मण बाणवर्षावाचे युद्ध : गर्जतां देखोनि थोर वानर। क्षोभला इंद्रजित दुर्धर। रणीं मारावया सौमित्र। दुर्धर शर वर्षत।।६०।। त्याचपरी सौमित्र क्रूर। बाण वर्षे घोरांदर। दोघे वीर अति दुर्धर। येरं येर नाटोपती।।६१।।

अन्योन्यं निशितैबाणैर्जघ्नतुर्भीमविक्रमौ। परस्परवधे वीरौ निविष्टौ तौ महाबलौ।।५।।
चक्रतुर्घोरमन्योन्यं शरजालाकुलं रणम्। ललाटे लक्ष्मणं बाणैः सुघोरैस्त्रिभिरिंद्रजित्।।६।।
अमेद्यं कवचं मत्वा विव्याध लघुहस्तवित्। अर्दितस्त्वथ बाणौघैस्तेनामित्रेण लक्ष्मणः।।७।।

येरयेरांचा घ्यावा प्राण। धगधगीत विंधिती बाण। बाणासवें धांव घेऊन। हाणिती जाणवज्रमुष्टी।।६२।। हाणितांचि वज्रमुष्टी। दुजा ओपी कोंपराटी। घायें मूर्च्छित पाडी सृष्टीं। वीर जगजेठी संग्रामीं।।६३।। दोघे उसळतीं महाबळी। दोघे भिडती अंतराळीं[2]। दोघे उतरोनि भूतळीं। शरजाळीं वर्षत।।६४।। दोघे विंधितां बाण। बाणीं संपूर्ण केलें रण। रणीं नाटोपे लक्ष्मण। इंद्रजित आपण विचारी।।६५।। वज्रकवची लक्ष्मण। त्यासीं न भेदती बाण। लल्लाटदेश वर्मस्थान। विंधी आपण तीं बाणीं।।६६।। ब्रह्मांडीं भेदतांचि बाण। मूर्च्छित पाडिला लक्ष्मण। कांही नाठवे पैं स्फुरण। आपणां आपण विसरला।।६७।। विकळ देखोनि लक्ष्मण। त्याचा सवेग घ्यावा प्राण। इंद्रजित वर्षे अमित बाण। अति दारुण साटोपें।।६८।। सौमित्र वीर महाबळी। औटकोटी[3] रोमावळी[4]। ऐसा खिळितां बाणजाळीं। पडे धरातळीं मूर्च्छित।।६९।। सर्वांग भेदतांचि शरीं। हनुमंताच्या हातावरी। मूर्च्छा दाटली सौमित्रीं। निशाचरीं देखिजे।।७०।। इंद्रजित गर्जत आपण। रणीं पाडिला लक्ष्मण। आतां मारितां बिभीषण। याचा प्राण कोण राखे।।७१।। बिभीषणाचा निजप्राण। इंद्रजित घेवों पाहे आपण। ऐसें ऐकतां वचन। आलें स्फुरण सौमित्रा।।७२।। देहीं देहाची विकळता[5]। ते दवडोनि सत्वावस्था। राखावया शरणागता। होय उठता सौमित्र।।७३।। श्रीरामाचें नाम स्मरतां। पळाली देहाची विकळता। राखावया शरणागता। होय उठता सौमित्र।।७४।। सावध श्रीराम आठवितां। देही असोन विदेहता। तरी राखावया शरणागता। होय उठता सौमित्र।।७५।। शरणागता वज्रपंजर। तो हा सत्य सौमित्र। चापबाणेंसीं सत्वर। महावीर उठिला।।७६।। माझी देखोनि विकळवृत्ती। भय न धरावें चित्तीं । मागें न सरावें मारुती। हें मी तुजप्रती मागतों।।७७।। मागें सरतां युद्धस्थिती। सूर्यवंशा अपकीर्ती। माझी बुडाली शौर्यवृत्ती। यश कीर्ति रामाची।।७८।। तिळभरी मागें सरणें। हेंचि आम्हांसी गा उणें। मागें सरोनि जीवें जिणें। त्याहून मरणे वरिष्ठ।।७९।। ऐकोनि सौमित्राचें बोलणें। हनुमंत जीवें प्राणें। त्यासीं करितसे निंबलोणें। शौर्यगुणें संतोष।।८०।। घायीं झाल्याही जर्जर । धैर्य न सांडी सौमित्र। तेणें विस्मित वानर । विस्मित वीर हनुमंत।।८१।। पाठींसीं घालोनि शरणागत। करावया इंद्रजिताचा घात। खवळला काळकृतांत। रणप्राणांत सौमित्र।।८२।। ललाटीं लागतां तीन बाण। सौमित्र पडिला मूर्च्छापन्न। सवेंचि होतां सावधान। कैसें चिन्ह शोभत।।८३।।

शरैस्त्रिभिरदीनात्मा ललाटस्थैः शरोत्तमैः। लक्ष्मणः शुशुभे वीरस्त्रिशृंग इव पर्वतः।।८।।

---

शब्दार्थ : १. मोठेपणा, २. आकाशात, ३. साडेतीन कोटी, ४. केशसमूह, ५. ग्लानी.　　　　श्रीभा. रा.... १३०

उद्ववर्ष शरान्घोरान्रावणात्मजवारणान्। तमाशु प्रतिविव्याध लक्ष्मणः पंचभिः शरैः॥९॥

ततः शोणितदिग्धांगौ लक्ष्मणेंद्रजितावुभौ। रणे विरेजतुर्वीरौ पुष्पिताविव किंशुकौ॥१०॥

मस्तकीं लागतां तिन्ही बाण। व्यथा न मानी लक्ष्मण। रणीं दिसे शोभायमान। त्रिशुंगी[1] जाण पर्वत॥८४॥ रावणसुत रणोन्मत्त। रणीं खवळला मदोन्मत्त। त्यासीं मयूरपिच्छांकित। बाण विंधित सौमित्र॥८५॥ पुष्पित तरु पर्वतावरी। तैसे बाण सुवर्णपत्री। शोभती लक्ष्मणाच्या शिरीं। संग्रामगिरी डुल्लत॥८६॥ मयूरपिच्छांकित शर। अंगी रुतले अपार। पिच्छ पसरोनि नाचे मयूर। तेंवी निशाचर शोभत॥८७॥ लागतां सौमित्राचें बाण। इंद्रजित क्षोभला दारुण। घेवोनि पांचही निर्वाणबाण। रणीं लक्ष्मण विंधिला॥८८॥ घातपात वर्मस्थ। लघुलाघवें घाय देत। घायें घाय निवारित। दोघे उन्मत्त रणरंगी॥८९॥ परस्परें घाय देत। दोघे जाले रुधिरोक्षित[2]। जैसे किंशुक[3] वसंतांत। तैसे शोभत रणरंगीं॥९०॥ येरयेरां मारणें आपण। निर्वाणयुद्ध अति दारुण। काढून वरदाचे बाण। घ्यावया प्राण विंधिती॥९१॥

स लक्ष्मणाय संक्रुद्धः शक्रजिच्छरमाददे। उत्तमं रक्षसां मध्ये यमदत्तं महाबलः॥११॥

तं समीक्ष्य महातेजा महेषुस्तेन सन्धितुम्। लक्ष्मणौ व्याददे बाणमन्यं भीमपराक्रमः॥१२॥

कुबेरेण स्वयं दत्तं स्वप्ने बाणं महात्मना। दुर्जयं दुर्विषंह्य च सेंद्रैरपि सुरासुरैः॥१३॥

ताभ्यां तु धनुषि श्रेष्ठे संहितौ सायकोत्तमौ। विकृष्यमाणौ वीराभ्यां भृशं जज्वलतुः श्रियम्॥१४॥

तौ भासयन्तावन्योन्यं धनुर्भ्यां विशिखौ च्युतौ॥१५॥

**इंद्रजिताच्या यमदत्त वरदबाणांआधीच लक्ष्मण इंद्रजिताचा हात तोडतो :** घ्यावया लक्ष्मणाचा प्राण। यमदत्त वरदबाण। इंद्रजित सज्जी आपण। अति निर्वाण संग्राम॥९२॥ इंद्रजितें देखोनि निजप्राणांत। मग निर्वाणा घातला हात। वरदबाण यमदत्त। स्वयें सज्जित संग्रामीं॥९३॥ यमदत्त वरदबाण। रणीं शत्रूचा घ्यावा प्राण। ऐसें त्याचें वरदान। निवारण असेना॥९४॥ इंद्रजित सज्जितां दुर्धर बाण। स्वयें सावध लक्ष्मण। स्वप्नदत्त कुबेरबाण। सज्जी आपण साटोपें॥९५॥ लक्ष्मणें नग्न देखतां सीता। विकल्प नुपजे चिता। कामकुबेर ये एकात्मता। स्वप्नावस्था वरदोक्ती॥९६॥ कामें दिधला निष्काम बाण। छेदक स्थूळलिंगकारण। कुबेर वदला वरदान। जय संपूर्ण पावसी॥९७॥ ज्यावरी योजिसी हा बाण। त्याचें करील निर्दळण। कुबेर वदे वरदान। जाला लक्ष्मण जागृती॥९८॥ वर वदला स्वप्नस्थितीं। तो बाण उरलासे जागृतीं। इंद्रजितासीं लावावया ख्याती। तोचि सीतीं[4] योजिला॥९९॥ दोघे वीर पडिपाडी[5]। धनुष्य ओढितां कानाडी। लक्ष्मण न वांचे निर्वडी। हडबड गाढी सुरवरां॥१००॥ यमवरदाचा बाण। अवश्य याचा घेईल प्राण। कैसेनि वांचेल लक्ष्मण। चिंता गहन स्वर्गस्थां॥१॥ भूतळींचे ऋषीश्वर। सिद्ध चारण विद्याधर। अवघे करिती हाहाकार। रणीं सौमित्र केंवी वांचे॥२॥ इंद्रजित बाण सोडी। तंव सौमित्र रणनिर्वडीं। समूळ त्याचा बाहु खुडी। पाडिला बुडीं सचाप॥३॥ बाहु छेदितां सत्वर। आक्रंदला निशाचर। सुरवर करिती जयजयकार। धन्य सौमित्र धनुर्वाडा॥४॥ त्याचा येतां शर दारुण। बाणामागें विंधी बाण। बाहु पाडिला छेदून। धन्य लक्ष्मण धनुर्वाडा॥५॥ यमदत्त वरदबाण। मूळ गुह्य वदे आपण। इंद्रजितहस्तें पापाचरण। पुरश्चरण सौमित्रें॥६॥ श्रीरामाचा सहोदर। तो तंव आमुचाही सुमित्र। बाणें करोनि नमस्कार। रिघे सत्वर तूणीरीं[6]॥७॥ जय द्यावया सुमित्रासुता। सेवा घडावया श्रीरघुनाथा। बाण निघाला लक्ष्मणभातां। करावया घाता इंद्रजिताच्या॥८॥ बाहु छेदिला सचापशर। रणीं खवळला निशाचर। खड्गहस्तीं अति दुर्धर। मारूं सौमित्र धांविन्नला॥९॥

**शब्दार्थ :** १. तीन शिखरांचा, २. रक्ताने भरलेले, ३. पळस, ४. दोरीवर, ५. कौशल्याने, ६. भात्यात.

रुधिर वाहत धरधरां। बाण तोडित खड्गधारा। मारावया सौमित्रा। निशाचर साटोप ॥११०॥ माझा झाल्या भुजपात। मी नाहीं झालो शंकित। झणीं[1] श्लाघसी[1] तूं येथ। करीन घात निमेषार्धे॥११॥ बाहु तुटला तें नाठवत। खड्ग घेवोनि तळपत। उल्हाळ[2] देवोनि उसळत। करावया घात सौमित्रा॥१२॥ थरक सरक चवक। दावित शौर्याची आगळिक। आला सौमित्रा संमुख। खड्गें मस्तक छेदावया॥१३॥ सौमित्र सोडी जे जे बाण। खड्धारा तोडी आपण। रणीं मारावया लक्ष्मण। आला गर्जोन खड्गेंसीं॥१४॥ इंद्रजित देखोनि दुर्धर। रणीं खवळला सौमित्र। दंडावया निशाचर। रुद्रास्त्र संयोजी॥१५॥

सौमित्रिरथ संक्रुद्धः संदधेऽस्त्रं सुदारुणम्। रौद्रं स चेंद्रजित्क्रद्धो व्यसृजत्तदनंतरम्॥१६॥

सबीजमंत्रे समंत्र।अभिमंत्रोनि रुद्रास्त्र। सवेग सोडी पैं सौमित्र। निशाचर दंडावया॥१६॥ येतां देखोनि शस्त्रपात। इंद्रजित खड्गधारा हाणित। घायीं ठिणग्या[3] उसळत। लखलखित आकाशीं॥१७॥ घाव चुकवावया नेहटीं। पळों जातां गुप्त परिपाठीं। रुद्रास्त्रें पुरविली पाठी। कपिपुच्छासाठीं पळवेना॥१८॥ पळों जातां पळवेना। लपों जातां लपवेना। घाव वारितां निवारेना। लागली नयना टकमक॥१९॥ सौमित्राचा शस्त्रघात। खड्गेंसीं छेदून हात। पाडिला पैं लंकेआंत। सुर गर्जत स्वानंदें॥१२०॥ छेदितां दोन्ही भुजाभार। निःशस्त्री जाला निशाचर। शस्त्रें न हाणितां सौमित्र। इंद्रजित थोर क्षोभला॥२१॥

लक्ष्मणाला ग्रासण्यासाठी इंद्रजिताची धाव : आम्ही गिळावें मनुष्यासी। मुख्य हातेर हें आम्हांसीं। तुज मी गिळीन निमिषेंसीं[4]। अति आवेशीं धांविन्नला॥२२॥ दोहीं बाहीं वाहतां रुधिर। रणीं खवळला निशाचर। गिळावया सौमित्र। पसरोनि वक्त्र चालिला॥२३॥ अमित विंधितांही बाण। मागें न सरे आपण। गिळावया लक्ष्मण। पसरोनि वदन धांविन्नला॥२४॥ ग्रहणीं राहु गिळी चंद्र। तैसा गिळावया सौमित्र। धांविन्नला निशाचर। विशाळ वक्त्र पसरोनी॥२५॥ साधारण बाणघात। तेणें मरे इंद्रजित। त्याचा करावया शिरःपात। निर्वाणशर घेत सौमित्र॥२६॥

तमिंद्रदत्तं सौमित्रिः समरेष्वपराजितः। शरश्रेष्ठं धनुःश्रेष्ठे नरश्रेष्ठोऽभिसंदधे॥१७॥
संधाय च धनुःश्रेष्ठं विकर्षन्निदमब्रवीत्। लक्ष्मीवांल्लक्ष्मणो वाक्यमर्थसाधनमात्मनः॥१८॥
धर्मात्मा सत्यसंधश्च रामो दाशरथिर्यथा। पौरुषे चाप्रतिद्वंद्वस्तथेमं जहि राक्षसम्॥१९॥
इत्युक्त्वा बाणमांकर्ण विकृष्य तमाजिह्मगम्। लक्ष्मणः समरे वीरः ससर्जेन्द्रजितं प्रति॥२०॥
तच्छिरः सशिरस्त्राणं श्रीमज्ज्वलितकुंडलम्। प्रमथ्येंद्रजितः कायात्पातयामास भूतले॥२१॥

लक्ष्मणाकडून इंद्रदत्त - वरदबाणाने इंद्रजिताचा शिरच्छेद : घ्यावया इंद्रजिताचा प्राण। इंद्रदत्त वरदबाण। सौमित्रें सज्जिला आपण। ज्यासीं निवारण असेना॥२७॥ बाणश्रेष्ठ वीरश्रेष्ठ। धनुष्य वाहिलें अतिश्रेष्ठ। कानाडी ओढिली यथेष्ट। शत्रुकंठ छेदावया॥२८॥ हाणितां बहुत शस्त्रघात। नव्हे इंद्रजितशिरःपात। यालागीं निर्वाणबाण अद्भुत। स्वयें सज्जित सौमित्र॥२९॥ युद्ध मांडिलें निर्वाण। सज्जोनि निर्वाणींचा बाण। घालोनि श्रीरामाची आण[5]। विंधी आपण सौमित्र॥१३०॥ कैसे कैसे रामशपथ। लक्ष्मण घालिता झाला येथ। सावधान तो वृत्तांत। श्रोते श्रीमंत परिसोत॥३१॥ श्रीराम धर्माधर्मातीत। तोचि धर्मात्मा सुनिश्चित। येणें सत्यें शिरःपात। हो रणांत शत्रूचा॥३२॥ श्रीराम सत्यासत्यातीत। श्रीराम सत्याचें निजसत्य। जरी हें श्रीरामसत्यव्रत। हो शिरःपात शत्रूचा ॥३३॥ श्रीराम स्त्रीपुरुषातीत। तोचि स्त्रीपुरुष समस्त। हेंचि श्रीरामाचें निजव्रत। तरी हो शिरःपात शत्रूचा॥३४॥ श्रीराम

शब्दार्थ : १. अभिमान धरूं नकोस, २. आरोळी, ३. किटाळे, ४. क्षणात, ५. शपथ.

दशरथाचा सुत[१]। तोचि ब्रह्म सदोदित। येणें सत्यें इंद्रजित। पडो रणांत या बाणें॥३५॥ श्रीराम स्त्रीपुत्रीं युक्त। सकळ कुटुंबेंसीं नांदत। तो राम सत्य द्वैतातीत। हो शिर:पात बाणें येणें॥३६॥ रामा नाहीं द्वंद्वभान[२]। तो सर्वांगी चैतन्यघन। येणें शपथें शिर:पतन। पावो आपण इंद्रजित॥३७॥ सकळ भूतें श्रीरघुनाथ। हें वेदशास्त्रां सत्य संमत[३]। तरी इंद्रजिताचा शिर:पात। हो रणांत बाणें येणें॥३८॥ माझा आत्मा श्रीरघुनाथ। हेंचि श्रीरामाचें नित्यव्रत। येणें इंद्रजिताचा शिर:पात। हो रणांत बाणें येणें॥३९॥ घालितां श्रीरामाची आण। इंद्रजिताचा गेला प्राण। लक्ष्मणें विंधोनियां बाण। शिर सत्राण छेदिलें॥१४०॥ धन्य निधडा सौमित्र। विंधोनियां बाण दुर्धर। गगना उडवोनियां शिर। निशाचर पाडिला॥४१॥

ततः स निपपाताशु धरण्यां रावणात्मजः। कवची सशिरस्त्राणो विप्रविद्धशरासनः॥२२॥
चुक्रुशुस्ते ततः सर्वे वानराः सबिभीषणाः। प्राहृष्यन्निहते तस्मिन्देवा वृत्रवधे यथा॥२३॥
यथांतरिक्षे भूतानामृषीणां च महात्मनाम्। बभूव जयसन्नादो गंधर्वाप्सरसामपि॥२४॥

मुकुट कुंडले शिरस्त्राण शिरीं। कवची खड्गी धनुर्धारी। शिर छेदोनियां बाणाग्रीं। धरेवरी पाडिला॥४२॥ इंद्रजित पडतां क्षितीं[४]। वदे सौमित्राची स्तुती। तूं परमात्मा ब्रह्ममूर्ती। मी परम मुक्ती पावलों॥४३॥ नमस्कार हनुमंता। नमन वानरां समस्तां। नमस्कार श्रीरघुनाथा। परम मुक्तता पावलों॥४४॥ इंद्रजित पडतां धरेवरी[५]। वानरवीरां हर्ष भारी। श्रीरामनामाच्या गजरीं। जयजकारी गर्जती॥४५॥ विजयी झाला लक्ष्मण। हरिखें नाचे बिभीषण। स्वर्गीं उल्लासले सुरगण। भेरी निशाणें त्राहाटिलीं॥४६॥ गंधर्व गाणीं गाती। हर्षें अप्सरा नाचती। दिव्य सुमनें[६] नेणों किती। सुर वर्षती स्वानंदें॥ ४७॥ इंद्र चंद्र वरुण कुबेर। हरिखें नाचती समग्र। वृत्रवधाहूनि फार। हर्ष निर्भर सुरसिद्धां॥४८॥ आनंदाच्या सुखनिर्भरीं। स्वर्गीं गिरागजरीं। सिद्धचारणऋषीश्वरीं। जयजयकारीं गर्जिजे॥४९॥ धन्य सौमित्र रामबंधु। केला इंद्रजिताचा वधु। एका जनार्दना स्वानंदु। परमानंद रामायणीं॥१५०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायामिंद्रजितवधो नाम एकोनचत्वारिंशत्तमोऽध्यायः॥३९॥ ओंव्या॥१५०॥ श्लोक॥२४॥ एवं॥१७४॥

## अध्याय चाळिसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः॥

### लक्ष्मणाला सावध केले

इंद्रजित वधाने वानर सैन्याला व देवादिकांना हर्ष : रणीं पाडूनि इंद्रजित शूर। विजयी झाला सौमित्र। हर्षे उपरमती वानर। जयजयकार करोनी॥१॥ इंद्रजित पडतांचि रणपाडीं[७]। तेचि काळीं तेचि घडी। बिभीषणा हर्षकोडी। जोडिला जोडी आल्हाद॥२॥

पतितं रावणिं ज्ञात्वा सा राक्षसमहाचमूः। वध्यमाना प्रदुद्राव हरिभिर्जितकाशिभिः॥१॥
केचिल्लंकामभिमुखं प्रविष्टा वानरार्दिताः। समुद्रे पतिताः केचित्केचिच्छैलान्समाश्रिताः॥२॥
हतमिन्द्रजितं दृष्ट्वा शयानं धरणीतले। जहर्ष शक्रो भगवान्सह सर्वैर्महर्षिभिः॥३॥
जगाम निहते तस्मिन्राक्षसे पापकर्मणि॥४॥

रणीं पडतां इंद्रजित वीर। राक्षसांचे महाभार। वानरीं त्रासितां अपार। निशाचर पैं पळती॥३॥ धाकें धाकें राक्षसकोडी। धरिली समुद्राची थडी। एक पळाले लंकापहाडीं। पर्वतीं दडी देती एक॥४॥ पडिल्या देखोनि इंद्रजितासी। अति उल्हास पैं इंद्रासीं। उल्हास

शब्दार्थ : १. पुत्र, २. सुखदुःखादिकांचे स्मरण, ३. मान्य, ४. पृथ्वीवर, ५. फुले, ६. रणांगणात.

सुरनरसिद्धांसी। आल्हादेंसी नाचती ॥५॥ मारितां इंद्रजिता महापाप्यासी। परम सुख सदाशिवासीं। अति उल्लास ब्रह्मयासीं। वंशज दुष्टासी मारितां ॥६॥ दश दिशा विधूमवंता[1]। सुप्रसन्न उगवे सविता[2]। निर्मळ जळें वाहती सरिता[3]। सुख समस्तां सौमित्रें ॥७॥ सौमित्राची आंगवण। स्वयें वानिती शिवगण। स्वर्गीं वानिती सुरगण। वानरगण भूतळीं ॥८॥ रणीं लाहोनि निजविजया। उभवोनि पुच्छाचिया गुढिया। वानर नाचती सुखोर्मिया[4]। उभवोनि बाह्या रामनामें ॥९॥ रामनामगीत गात। विजयसुखें नृत्यान्वित। वानर स्वानंदें डुल्लत। रणीं गर्जत हरिनामें ॥१०॥ रणीं विजयाचा उत्साहो। देखोनि वानरांचा लवलाहो। सौमित्र महाबाहो। काय स्वयमेव बोलत ॥११॥

रुधिरक्लिन्नगात्रस्तु लक्ष्मणः शुभलक्षणः। बभूव हृष्टस्तं हत्वा शत्रुजेतारमाहवे ॥५॥

ततः स शरभं वीरं जांबवंतं च वीर्यवान्। संनिपत्य महातेजास्तांश्च सर्वान्वनौकसः ॥६॥

व्यथित लक्ष्मणाचा आदेश: लक्ष्मणाचे शुभ लक्षण। विकळ जाहलिया प्राण। न सांडून रणांगण। शत्रु संपूर्ण निर्दाळिला ॥१२॥ अवघे ऐका सावचित्त। रामप्रतापें रणाआंत। म्यां मारिला इंद्रजित। स्वयें सांगत सौमित्र ॥१३॥ इंद्रजित मारिला शौर्यवृत्ती। ते तंव नव्हे माझी शक्ती। श्रीरामप्रतापयुक्ती। स्मरणानुवृत्तीं[5] निर्दाळिला ॥१४॥ श्रीराम माझे बळाचें बळ। श्रीरामबळें शौर्यशीळ। इंद्रजिताचें शिरकमळ। छेदिलें समूळ श्रीरामसत्वें ॥१५॥ घालोनि श्रीरामाची शपत। म्यां मारिला इंद्रजित। ऐसें लक्ष्मण सांगत। चांचरी जात विकळत्वें ॥१६॥ रणीं भिडतां निशाचरा। बाणीं खिळलें सौमित्रा। सर्वांगी रुधिरधारा। तेणें शरीरा विकळत्व ॥१७॥ तिन्ही बाण रुतले कपाळीं। ते भेदले ब्रह्मांडमूळीं। बाणीं खिळिल्या रोमावळी[6]। तेणें महाबळी विकळांग ॥१८॥ शरभ जांबवंत कपिगण। युद्धीं निवारोनि जाण। पाचारोनि बिभीषण। काय लक्ष्मण सांगत ॥१९॥ मी घायवट सर्व शरीरीं। सर्वांग निथळे[7] रुधिरीं। प्राणांत मज देखिल्यावरी। राम पोटीं सुरी घालील ॥२०॥ यालागीं पूर्वसूचनेवरी। सुग्रीवसंज्ञानुकारीं। शस्त्रें काढवावीं दूरी। पुढें वानरीं जाऊनी ॥२१॥ संतोषावया श्रीरामचंद्र। देवोनि इंद्रजिताचें शिर। पुढें धाडावे वानर। अति चतुर बोलके ॥२२॥ वानावी माझी वाढीव। करावी माझी भाटीव। संतोषलिया राघव। शस्त्रें सुग्रीव काढील ॥२३॥

लक्ष्मणाला मूर्च्छा : हें अंतीचे माझे वचन। तुम्ही करावें सावधान। ऐसें बोलतां लक्ष्मण। मूर्च्छापन्न स्वयें पडला ॥२४॥ झांकले दोन्ही नयन। खुंटलें वदतें वदन। तें देखोनियां बिभीषण। वानरगण अति दुःखी ॥ २५॥ सखा अंतरला लक्ष्मण। वानर करिती शंखस्फुरण। दुःखीं फुटे बिभीषण। अवघे जण लोळती ॥२६॥ कोण कोणा आश्वासील। कोण कोणा संबोखील। अवघ्यां समान कळवळ। अति तळमळ वानरां ॥२७॥ तंव बोलिला जांबवंत। साधिला सौमित्रें कार्यार्थ। मध्यें ओढवला अति अनर्थ। गडबडित अति दुःखी ॥२८॥

हनुमंताचा शोक, आज्ञा : अवघ्या सांगे हनुमंत। सौमित्रआज्ञा करा समस्त। यासी घेवोनि जावें तेंथ। श्रीरघुनाथ वंदावया ॥२९॥ मी तंव न यें रामापासीं। मज निरविलें[8] सौमित्रासीं। रणीं मारवोनि त्यासी। काय रामासी मुख दावूं ॥३०॥ बळी देवोनि लक्ष्मणासी। रणीं मारिलें इंद्रजितासी। पूर्ण जहालों अपेशी। काय रामासी मुख दावूं ॥३१॥ बळीं दिधलें सौमित्रासी। हें यश मिरवूं अति श्लाघ्यतेसीं[9]। अपेशकाळिमा आली मुखासीं। काय रामासी मुख दावूं ॥३२॥ मरों जातां न ये मरण। धिक् चिरंजीवपण। मज न जाळी हुताशन। समुद्र मग्न मज न करी ॥३३॥ मरण न ये पर्वतपातें। न चले शस्त्राचा आघात। विष घेतल्या न ये

---

शब्दार्थ : १. धूम्ररहित, २. सूर्य, ३. नद्या, ४. आनंदाच्या उकळ्यांनी, ५. स्मरणाचे योगाने, ६. केशपंक्ती, ७. वाहे, ८. स्वाधीन केले, ९. अभिमानाने.

अंत। अपेशवंत मी एक॥३४॥ अपेशें गांजिलों मी मोठां। पडल्या पडल्या येथें करंटा। वाळोनि होईन खराटा। परी त्या वाटा मी न यें॥३५॥ तंव बोलिला बिभीषण। भाक देवोनि आपण। आणून मारविला लक्ष्मण। अपेशी पूर्ण मी जालों॥३६॥ अपेश बैसलें माझे माथां। काही चालेना पैं आतां। केंवी मुख दावूं रघुनाथा। मरणावस्था मज आली॥३७॥ अपेश बैसलें दारुण। वांचल्याचे फळ कोण। अवश्य सांडीन मी प्राण। बिभीषण अनुवादे॥३८॥ ऐकोनि क्षोभला हनुमंत। येथें मत्तरां शरणागत। प्राण सांडील रघुनाथ। ऐसा अनर्थ न करावा॥३९॥ जाहल्या सौमित्राचा घात। वांचो न शके रघुनाथ। मरतांचि शरणागत। सद्य:प्राणांत श्रीरामा॥४०॥ लक्ष्मणाचें आज्ञापन। आम्ही करूं अवघे जण। मीही येतों गा आपण। रघुनंदन वंदावया॥४१॥ देऊनि इंद्रजिताचें शिर। गुढिया उभवोनि सत्वर। पुढें धाडावें वानर। अति चतुर ते कोण॥४२॥ तंव बोलिला बिभीषण। इंद्रजिताचें शिर घेऊन। पुढें जाईन मी आपण। रघुनंदन उल्लासा॥४३॥ बिभीषण निशाचर। घेवोनि इंद्रजितांचें शिर। गुढिया उभवोनि वानर। अति सत्वर निघाले॥४४॥ मागील जे का वानरवीर। उचलोनियां सौमित्र। अंगीचा सलों[1] न देता शर। अति अरुवार चालती॥४५॥

अथाचचक्षे धर्मात्मा राघवाय बिभीषण:। छिन्नमिंद्रजित: शीर्षं लक्ष्मणेन महात्मना॥७॥
निवेदयित्वा रामाय तस्थौ हृष्टो बिभीषण॥८॥

**श्रीरामांपुढे इंद्रजिताचे शिर ठेवून बिभीषणाचे कथन :** पुढें येवोनि बिभीषण। वंदूनि श्रीरामाचे चरण। लक्ष्मणाचें रणांगण। सांगे आपण तें ऐका॥४६॥ सप्तावरणें दुर्धर वाट। करोनि सौमित्रें सपाट। उघडोनियां यज्ञवाट। झाला प्रविष्ट होमस्थानीं॥४७॥ इंद्रजित होम करित। कुंडी निघाला साश्व[2] रथ। उडी घालोनि हनुमंत। इंद्रजित आंसुडिला॥४८॥ कर्म न होतां समाप्त। उठविला इंद्रजित। बिभीषण घेवोनि आला येथ। त्या माझा घात करूं धांवे॥४९॥ पाठीसीं घांलोनि शरणागत। सौमित्र आला युद्धाआंत। त्यासी देखोनि इंद्रजित। साशंकित स्वयें झाला॥५०॥ विवर सांडोनियां कपटी। गेला मेघाचिये पृष्ठीं। मग हनुमंतें उठाउठीं। सौमित्र जगजेठी तेथें नेला॥५१॥ सौमित्र निधडा वीर शूर। अचुक संधानी दुर्धर। वारु[3] सारथी रहंवर। बाणीं सत्वर छेदिले॥५२॥ बाणीं बाणनिवारण। शस्त्रीं शस्त्रनिराकरण। दोघे योद्धे विचक्षण। रण प्रवीण संग्रामीं॥५३॥ अचुक सौमित्राचा हात। उभय भुजां करोनि घात। सवेंचि केला शिर:पात। तें शिर येथ आणिलेंसे॥५४॥ बिभीषण अति चतुर। आणून इंद्रजिताचें शिर। ठेविलें श्रीरामासमोर। देखोनि वानर बुजाले[4]॥५५॥ धन्य सौमित्र आतुर्बळी। बाण भेदले कपाळीं। हेमपिच्छाची मुंडावळी। शिरासीं बांधिली रणरंगी॥५६॥ मिशा मुर्डिवा विशाळा। दाढा विकट विक्राळा। बाण भेदले कपाळा। कपाळीं टिळा गोरोचनाचा॥५७॥ देखोनि हरिखला राघव। बिभीषणसंज्ञा सुग्रीव। शस्त्रसामग्री नेली सर्व। अतर्क्य लाघवविन्यासें[5]॥५८॥ लक्ष्मणाचें बळ दुर्धर। देखोनि इंद्रजिताचें शिर। ऐकोनि बिभीषणउत्तर। हर्षे रघुवीर अनुवादे॥५९॥

बिभीषणवच: श्रुत्वा हर्षव्याकुललोचन:। बिभीषणं पुरस्कृत्य हनूमंतं च राघव:॥९॥
जांबवंतं ससुग्रीवं सभाज्य च वनौकस:। शूरमिक्ष्वाकुशार्दूलं समाश्वासयतानुजम्॥१०॥
रामचंद्रसमो भ्राता लक्ष्मणं शुभलक्षणम्। उपवेश्य तमुत्संगे परिष्वज्य सुपीडितम्॥११॥
पीडितं सायकैर्दृष्ट्वा। दु:खितो राघवस्तदा। दु:खहर्षयुतो राम: स मूर्च्छित इवाबभौ॥१२॥

शब्दार्थ : १. खुपू न देता, २. अश्वांसह, ३. घोडे, ४. भयचकित झाले, ५. कौशल्याने.

लक्ष्मणाची स्थिती ऐकून श्रीरामांना मूर्च्छा : देखोनि इंद्रजिताचे शिर। ऐकोनि बिभीषणउत्तर। सौमित्रप्रताप अति गंभीर। तेणें रघुवीर हरिखला॥६०॥ लक्ष्मण योद्धा अति गहन। तेणें हरिखला रघुनंदन। वर्षे स्वानंदजीवन। संतप्त जन निववावया॥६१॥ बाप कृपाळु रघुनाथा। बिभीषण हनुमान जांबवंता। अनुक्रमें आलिंगितां। वानरां समस्तां आल्हाद॥६२॥ अवघीं केला नमस्कार। अद्यापि कां न ये सौमित्र। ऐसें पुसतां श्रीरामचंद्र। झालें चरित्र तें एके॥६३॥ बाणीं जर्जर सर्व शरीरीं। सौमित्र उचलोनियां वानरीं। घालितां श्रीरामाचे मांडीवरी। नाहीं शरीरीं चेतना[१]॥६४॥ इंद्र वंदी ज्याचे बळासी। ऐसिया सबळ सौमित्रासी। बाणीं खिळिले सर्वांगांसी। पाहे चौपासी श्रीराम॥६५॥ तीन बाण हे कपाळीं। रुतले ब्रह्मांडीच्या मूळी। बाणीं भेदल्या रोमावळी। बाणजाळीं खिळिलासे॥६६। रणीं विंधिता शरधारीं। रिती[२] जागा अंगावरी। नाहीं उरली तिळभरी। शरीं शरीरीं खिळिला॥६७॥ इंद्रजितमरणें सुखोद्‌भूत। सौमित्रदुःखें दुःखित। रघुनाथ ऐसा हर्षशोकान्वित। पडे मूर्च्छित श्रीराम॥६८॥ श्रीराम पडतां मूर्च्छापन्न। गजबजिला बिभीषण। हडबडिले वानरगण। करिती रुदन अति दुःखें॥६९॥ दोघे पढियंते पूर्ण। येरयेरा जीव प्राण। सौमित्रदुःखें रघुनंदन। झणी[३] हा प्राण सांडील॥७०॥ मूर्च्छित पडतां रघुनंदन। सुग्रीव आणि बिभीषण। मिळोनिया वानरगण। करिती रुदन अति दुःखे॥७१॥ एक निमाला रणरंगी। दुजा निमतो तयालागीं। काय करावें या प्रसंगी। वानरांअंतरीं अति चिंता॥७२॥ सौमित्रातें आलिंगून। श्रीराम पडिला मूर्च्छापन्न। सवेंच चेतना लाहोन। सावधान स्वयें जाला॥७३॥

> उपलभ्य ततः संज्ञां लक्ष्मणं समुदैक्षत। मूर्ध्नि चैनमुपाघ्राय रामः शूरमुपागतम्॥१३॥
> कृतं परमकल्याणं कर्मेदं दुष्करं त्वया। अद्य मन्ये हते पुत्रे रावणं निहतं युधि॥१४॥
> निरमित्रः कृतोस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः। बलव्यूहेन महता श्रुत्वा पुत्रं निपातितम्॥१५॥
> त्वया लक्ष्मण नाथेन सीता च पृथिवी च मे। न दुष्प्रापा हते तस्मिन्शक्रजेतरि चाहवे॥१६॥

शुद्धीवर आल्यावर श्रीरामांचा शोक व प्राणत्यागाची तयारी : संज्ञा[४] पावोनि[४] रघुनंदन। घायीं जर्जरित लक्ष्मण। देखोनियां विगतप्राण। करी रुदन अति दुःखें॥७४॥ निकुंबळे जावोनि आपण। इंद्रजित मारोनि दिधला प्राण। तें कल्याण तेंचि अकल्याण। मज तुजवीण सौमित्रा॥७५॥ ऐकोनि इंद्रजिताचें मरण। निर्वाणयुद्धा येईल रावण। त्यासीं कोणें करावे रण। तुजवीण सौमित्रा॥७६॥ बारा वर्षे निराहारी[५]। राहोनियां ब्रह्मचारी। मारून दिधला माझा वैरी। तरी मजवरी कां रुसलासी॥७७॥ बारा वर्षे वनवासी। म्यां नाही पुसिलें आहारासी। तेणें मजवरी रुसलासी। लागोनि पायांसी बुझावूं॥७८॥ इंद्रजितासीं उठाउठीं। रणीं केली त्वां संवसाठी[६]। तुजवीण जगजेठी। मी ये सृष्टीं वांचेंना॥७९॥ निकुंबळे धाडिला एकला। तेणें धरिला त्वां अबोला। बंधुस्नेहें आक्रोशिला। आक्रंदला श्रीराम॥८०॥ दुर्धर इंद्रजिताचें मरण। तें त्वां साधिलें करोनि रण। रणांगणीं दिधला प्राण। तें अकल्याण मज केलें॥८१॥ करोनि इंद्रजिताच्या घाता। तवां निर्मुक्त केली सीता। वसुधा वश्य केली माझ्या हाता। सत्य तत्वतां सुबंधो॥८२॥ सीता सुंदर महासती। कोणें भोगावी वसुमती[७]। तुजवीण ऊर्मिलापती[८]। प्राण निश्चितीं त्यागीन॥८३॥ अनंत अपराध मजपाशीं। तेणें मजवरी रुसलासी। चरण झाडीन मी केंशी। उकसाबुकसीं स्फुंदत॥८४॥ धांव पावगा सौमित्रा।

---

शब्दार्थ : १. शुद्धी, २. रिकामी, ३. कदाचित्, ४. शुद्धीवर येऊन, ५. अन्नावाचून, ६. रणकंदन, ७. पृथ्वी, ८. हे लक्ष्मणा !

साद से कां सहोदरा[1]। माझिया दुःखा दुर्धरा। महावीरा निवारीं॥८५॥ केउता[2] गेलासी सुबंधु। अद्यापि कां ने देसी सादु। करितां श्रीरामासीं खेदु। दुःखबाधु समग्रां॥८६॥ तुजवीण मी अनाथ। तुजवीण मी हताहत। तुजवीण निजजीवित। त्यागीन निश्चित सौमित्रा॥८७॥ तुजवीन मी प्रभाहीन। तुजवीण मी हीन दीन। तुजलागीं त्यजीन प्राण। सत्य जाण सौमित्रा॥८८॥ राया दशरथाची आण[3]। तुजवीण मी त्यागीन प्राण। ऐसें बोलोनि रघुनंदन। घातलें आसन प्राणांता।।८९॥ देवोनि सौमित्रा आलिंगन। चुंबोनियां त्याचें वदन। श्रीरामें त्यागावया प्राण। घातलें आसन प्राणांत॥९०॥

हनुमंताची गर्जना : तें देखोनि हनुमंत। खवळला काळकृतांत। स्वयें येवोनि गर्जत। काय सांगत श्रीरामा॥९१॥ मी सेवक असतां जाण। कोण मारूं शकेल लक्ष्मण। तूं कां वृथा त्यजिसी प्राण। आंगवण पाहें माझी॥९२॥ यमें नेलिया लक्ष्मणासी। धुळी मेळवीन यमासी। शीक[4] लावीन कळिकाळासीं। सौमित्रासी नेतांचि॥९३॥ इंद्र चंद्र वरुण कुबेर। मुख्य करोनि दिवाकर[5]। त्यांचेनि न मारवे सौमित्र। मारिल्या समग्र निर्दळीन॥९४॥ सौमित्र नेलिया कैलासासीं। तेथून मी आणींन त्यासी। जरी नेला वैकुंठासीं। ख्याती करीन ते ऐका॥९५॥ उभें करोनियां भगवंतासी। झाडा घेईन वैकुंठासीं। ओळखोनि सौमित्रासी। तुझा तुजपासीं आणीन॥९६॥ नेलिया क्षीरसागरासीं। झाडा घेईंन शेषापासीं। उलथोनि नारायणासी। सौमित्रासी आणीन॥९७॥ सौमित्र शेषावतार बळी। अडकल्या नारायणातळीं[6]। तोही उलथोनि तत्काळीं। तुझा तुजजवळी आणीन॥९८॥ पृथ्वी मिनली पृथ्वीसीं। आप[7] मिनलें आपासीं। तेज मिनलें तेजासीं। प्राण वायूसी मीनला॥९९॥ आकाश मिनलें आकाशासीं। चैतन्य मिनलें चैतन्यासीं। कैंचा सौमित्र आणिसी। मूर्ख म्हणसी वानर॥१००॥ ऐसाही आणीन लक्ष्मण। तरी मी तुझा सेवक जाण। तुझें करितां नामस्मरण।अटक कोण मजलागीं॥१॥ तुझ्या नामाचेनि बळें। कळिकाळाची शक्ति गळे। संसार आपभयें[8] पळे। मोक्ष मावळे मिथ्यात्वें॥२॥ नामस्मरण परम धर्म। नाम निर्दळी कर्माकर्म। नाम केवळ परब्रह्म। पुरुषोत्तमहरिकीर्ती॥३॥ दादुगें[9] तुझें नामस्मरण। नामबळें लक्ष्मण। तुझा तुजपासीं आणीन। तेंही लक्षण अवधारीं॥४॥ पृथ्वी दमिली पृथूनीं। मीही दमीन मेदिनी। सौमित्राचें शरीर अवनी[10]। जंव आणोनि मज अर्पी॥५॥ आपीं[11] आपत्व तंव शोधीन। सौमित्रा निजजीवन। आणोनियां गा आपण। मदर्पण जंव करी॥६॥ निजतेजाच्या आवेशीं। तेज दमीन तेजासीं। सौमित्राच्या निजतेजासी। जंव मजपासीं तें अर्पी॥७॥ माझा निजपिता पवन। त्याचेंही करीन शोषण। लक्ष्मणाचा निजप्राण। जंव आणून मज अर्पी॥८॥ दंडणें न लगे आकाशासी। सहज प्रवेश आकाशीं। ध्यानीं धरोनि चैतन्यासी। चेतनेसी आणीन॥९॥ ध्यानीं धरोनि चैतन्या। आणीन जीवकळा चेतना। जावया देहींचा जडपणा। तेज निजप्राणा चेतवी॥११०॥ धरोनि चेतनेचा हात। प्राण प्रवेश देहाआंत। तंव तंव देहीं देहवंत। सावचित्त होय जीव॥११॥

सुषेणाचे आगमन : वांचवावया लक्ष्मण। सांडून स्थूळ लिंग कारण। हनुमान करूं पाहे उड्डाण। तंव सुषेण तेथे आला॥१२॥ हनुमंता तूं परोपकारी। आणिला होता द्रोणागिरी। दिव्यौषधी तयावरी। त्या म्यां गृहीं संग्रहिल्या[12]॥१३॥ पर्वतावेगळ्या औषधी जाण। न राहती अर्ध क्षण। घालितां श्रीरामपादकण। ओषधी संपूर्ण थांबल्या॥१४॥ त्यांचा रस

शब्दार्थ : १. हे बंधो! २. कोठे, ३. शपथ, ४. शिक्षा, ५. सूर्य, ६. श्रीविष्णूच्या खाली, ७. उदक, ८. आपोआप, ९. मोठे, १०. पृथ्वी, ११. उदकामध्ये, १२. साठविल्या.

देतां जाण। सावध होईल लक्ष्मण। ऐसें बोलतां सुषेण। रघुनंदन सुखावे ॥१५॥ ऐकतां हनुमंताची कथा। परम सुख रघुनाथा। आलिंगिला जीवापरता। उल्लासतां स्वानंदे ॥१६॥

स तं भ्रातरमश्वास्य परिष्वज्य च राघवः। रामः सुषेण मुदितः समाभाष्येदमब्रवीत् ॥१७॥
सशल्योऽयं महाप्राज्ञ सौमित्रिर्मित्रनंदनः। यथा भवति निःशल्यस्तथा त्वं कर्तुमर्हसि ॥१८॥
विशल्यकरणी नाम वने हिमवतः शुभा। लक्ष्मणाय ददौ नस्यं सुषेणः परमौषधिम् ॥१९॥
स तस्या गंधामाघ्राय विशल्यः समपद्यत। तथा निर्वेदनश्चैव संरूढव्रण एव च ॥२०॥

लक्ष्मण व्हावया सावधान। श्रीरामें जें केले रुदन। ऐसें नव्हे ते अमृतपान। स्वानंदजीवन संतप्तां ॥१७॥ अश्रु तेंचि अमृतपान। आलिंगन तेंचि विशल्यकरण। करसंस्पर्शें करी निर्व्रण[1]। कृपाळु पूर्ण श्रीराम ॥१८॥ निजभक्तांची जे जे व्यथा। नानापरींच्या नानावस्था। निवारण श्रीरघुनाथा। पुढील कथा अवधारा ॥१९॥

श्रीरामांच्या आज्ञेने सुषेणाच्या दिव्यौषधीने लक्ष्मण सावध होतो : सावध व्हावया लक्ष्मण। रामें पाचारोनि सुषेण। शल्या विशल्या ओषधी जाण। देववी आपण साक्षेपें ॥१२०॥ शल्या शल्य फेडी संपूर्ण। विशल्या घाय बुजी आपण। अंगीचे हरपती व्रण। ते सुवर्ण जाण दिव्यौषधी ॥२१॥ अंगीचें कानपोनि[2] व्रण। सुवर्णा करी सुवर्णवर्ण। ऐशिया दिव्यौषधी जाण। दे सुषेण सौमित्रा ॥२२॥ शल्या विशल्या देतां जाण। शल्यें विरालीं संपूर्ण। हर्षे निर्भर अंतःकरण। सावध होय सौमित्र ॥२३॥ ओषधी देतां सुवर्ण। कानपोनि अंगीचे व्रण। शरीर जालें सुवर्णवर्ण। उठला लक्ष्मण स्वानंदें ॥२४॥ पूर्विल्यापेक्षा जाण। शक्ति पावोनि शतगुण। साटोपें उठिला लक्ष्मण। रणीं रावण दंडावया ॥२५॥

बिभीषणमुखानां च सुहृदां राघवाज्ञया। तामोषधिं महाबाहुः सुषेणः प्रददौ तदा ॥२१॥

लक्ष्मण जालिया सावधान। बिभीषण सुग्रीव रघुनंदन। पाचारोनि सुषेण। सांगे आपण तें ऐका ॥२६॥ लक्ष्मणासवें वानर वीर। घायीं जालें अति जर्जर। ओषधी देवोनि सत्वर। करी समग्र सावध ॥२७॥ ऐसें सांगतां रघुवीर। असंख्यात कपि वानर। सुषेणे अपरिमित ऋक्षवीर[3]। केले समग्र सावध ॥२८॥ अपरिमित ऋक्षवीर। असंख्यात कपि वानर। बिभीषणाचे निशाचर। घायीं जर्जर अमित ॥२९॥ धन्य सुषेण वैद्यरावो। वेंचून ओषधींचा संग्रहो। अंगी व्रण न दिसे घावो। सकळ समुदावो सुखी केला ॥१३०॥ गेला क्लेशश्रमेंसी स्वेद। गेली शल्यबाधा गेला खेद। सकळ वीरांसी आल्हाद। परमानंद श्रीरामें ॥३१॥ पूर्विल्या बळापेक्षां जाण। प्रताप आला पैं चौगुण। उपमिती[4] आंगवण। गडगर्जन हरिनामें ॥३२॥ रामनामाचा गजर। वानरीं केला भुभःकार। संतोषला श्रीरामचंद्र। विशल्य[5] वीर देखोनी ॥३३॥ जैसें अमरां अमृतपान। तैशा वानरां ओषधी जाण। करितांचि अवघ्राण। सुखसंपन्न स्वानंदे ॥३४॥ सुखी झाला लक्ष्मण। सुखी झाला बिभीषण। सुखी झाले वानरगण। सुखसंपन्न सुग्रीव ॥३५॥ सुखी देखोनि सौमित्र। सुखावला श्रीरामचंद्र। तेणें संतोषें वानर। हर्षें निर्भर नाचती ॥३६॥ इंद्रजित मारोनि दुर्धर। विजयी झाला सौमित्र। वानरीं करोनि जयजयकार। हर्षें निर्भर नाचती ॥३७॥ किंशुकवृक्ष[6] उचलोनियां। उभवोनि पुच्छाग्रीं गुढीया। वानर नाचती लवलाह्या। श्रीरामरायाचेनि धर्में ॥३८॥ एका जनार्दना शरण। स्वानदें उठला लक्ष्मण। तेणें संतोषला रघुनंदन। कथा पावन श्रीरामें ॥३९॥ इंद्रजिताची निजकांता। सुलोचना पतिव्रता। तिच्या सतीत्वाची कथा। सावधानता अवधारा ॥१४०॥ रामें सत्या सत्ववृत्ती। रामें भक्तां भुक्ती मुक्ती। राम वैरियां परमगती। नामें त्रिजगती

शब्दार्थ : १. व्रणरहित, २. बुजून, ३. आस्वल, ४. तुलना करून पाहतात, ५. जखमेशिवाय, ६. पळसाचे वृक्ष.

पावन ॥१४१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणसावधानीकरणं नाम चत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥४०॥ ओंव्या ॥१४१॥ श्लोक ॥२१॥ एवं ॥१६२॥

# अध्याय एक्केचाळीसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## सुलोचनेचा अग्निप्रवेश

रणीं मारोनि इंद्रजित। सौमित्र झाला विजयान्वित। तेणें सुखावला रघुनाथ। सुग्रीवयुक्त स्वानंदे ॥१॥ हटी नष्टी कोटिकपटी। येणें इंद्रजित दुर्धर सृष्टीं। तो मारितां शस्त्रवृष्टीं। सुखानुकोटी सर्वांसी ॥२॥ सुखी झाले नरवानर। सुखी झाले ऋषीश्वर। दैत्य दानव सुरवर। सुखी समग्र सौमित्रें ॥३॥

इंद्रजिताची पत्नी ध्यानस्थ असता इंद्रजिताचा भुजदंडपात : येरीकडे लंकेमाझारी। इंद्रजिताची भुजा थोरी। पडली सुलोचनामंदिरीं। खड्गधारी सायुध ॥४॥ सुलोचना निजमंदिरीं। शिवस्वरूप आणोनि अंतरी। शिवस्मरणीं निरंतरीं। ध्यान करीत शिवाचें ॥५॥ जवळी असतां सखिया बहुत। शिवपूजा करीत अद्भुत। तंव अंगणीं पडुनी अकस्मात। ध्वनि होय भुजदंडाचा ॥६॥ ऐकोनियां तो ध्वनी। सुलोचना गजबजली मनीं। सर्वे सखिया घेऊनी। पाहे अंगणी निजदृष्टीं ॥७॥ सख्या म्हणती सुलोचने। स्वर्गी देवांदैत्यांशीं दारुण। युद्ध होत आहे जाण। भुजा तेथून पडियेली ॥८॥ ऐसा संवाद करितां जाणा। घाबरेपणें सुलोचना। जवळी येवोनियां नयनां। पतिहस्त जाणा ओळखिला ॥९॥ देखोनि इंद्रजिताचा कर। सुलोचना भूमीं घालीं शरीर। हृदयीं कवळोनियां सत्वर। विचार साचार पूसत ॥१०॥ म्हणे भुजे मायबहिणी। मूळ आलीस[1] मज साजणी। पति इंद्रजित रणांगणीं। केंवी सोडूनी आलीस ॥११॥ अभ्यंग मार्जन[2] उद्वर्तन[3]। करोनियां नीराजन[4]। स्वयें घालोनि लोटांगण। पुसे आपण भुजेसी ॥१२॥ निकुंभिले गेलियापाठीं। काय वर्तलें रणसंकटीं। तूं आलीस कासयासाठीं। ते गुह्य गोष्टी मज सांगें ॥१३॥ मजपासून इंद्रजित। युद्धा गेलिया वृत्तांत। काय झाला तो साद्यंत। मज यथार्थ सांगावा ॥१४॥ आम्ही तुम्ही वो साजणी। दोघी जणी एकांगबहिणी। काय वर्तलें रणांगणीं। समूळ कहाणी मज सांगें ॥१५॥ जरी मी असेन सत्यव्रत। पतिव्रता सुनिश्चित। तरी त्वां तेथींचा वृत्तांत। मज साद्यंत सांगावा ॥१६॥ तंव ते अचेतन भुजा। चेतना नाहीं तेथें सहजा। येरीनें स्मरला कैलासराजा। शरण तुज मी स्वामिया ॥१७॥

सुलोचनेच्या प्रार्थनेने इंद्रजिताच्या भुजदंडामध्ये शिवशक्तीचा प्रवेश : पतिभुजा अंगणी आली। चेतनाविरहित पडली। आत्मशक्ति चेतवूनि वहिली[5]। सजीव केली पाहिजे ॥१८॥ म्हणोनियां शिवालागीं। स्तुति करितां तये प्रसंगी। शिव दयाळु भक्तांलागीं। आज्ञा करी इंद्रातें ॥१९॥ म्हणे भुजांतरी प्रवेशोन। इंद्रजिताचे समरवर्तमान। समूळ करावें कथन। येथें अनमान न करावा ॥२०॥ होतां शिवाचे आज्ञापन। भुजांतरीं इंद्र जाण। प्रविष्ट होवोनि आपण। करी सचेतन भुजेसी ॥२१॥ ऐकतां सुलोचनेचें वचन। आलें भुजेसी स्फुरण। संज्ञा दावूनियां खूण। मागे साधन लेखनाचें ॥२२॥ तंव तिणें भूमिकेवरी। दऊत लेखणी झडकरी। आणोनि ठेविली निर्धारी। लिहून सत्वरीं मागितलें ॥२३॥

शब्दार्थ : १. आमंत्रण, २. स्नान, ३. उटणे, ४. आरती, ५. सत्वर.

भुजेने सर्व वृत्तांत लिहिला : पाचुबद्ध भूमिकेवरी। दऊत लेखणी घेऊन करीं। ओळी लिहिल्या व्यक्ताक्षरीं। अर्थकुसरीविन्यासें॥२४॥ तंव ते भूमि पाचुबद्ध। अक्षरें उमटलीं शुद्ध। तीं सुलोचना वाची सुबद्ध। अर्थ विविध जाणूनी॥२५॥ पतिव्रते सुलोचने। तुज वेचारोनि गेलिया जाण। लाहोनि रावणाचें आज्ञापन। युद्ध दारुण मग केलें॥२६॥ जेंकोनियां वानरगण। निकुंभिलेसीं जावोनि जाण। होमासी आरंभ करून। अग्नि सुप्रसन्न म्यां केला॥२७॥ प्रसन्न झालिया वन्ही। रथ प्रकटला प्रत्यक्ष दहनीं। चार अंगुळे चाकें ाहोनी। साठा[1] नयनीं देखिला॥२८॥ रथ होतांचि प्रकट। युद्ध करीन मी अचाट। ऐसा संकल्पाचा लोट। होतां अदृष्ट निष्फल॥२९॥ तंव घेऊन वानरभार। बिभीषण आणि हनुमान वीर। सर्वे घेऊनि सौमित्र। घाला सत्वर घातला॥३०॥ घेवोनियां प्रचंड शिळा। हनुमान होऊनि उतावेळा। रथावरी घालितां गोळांगुळा। रथ झाला भूमिगत॥३१॥ मज करीं धरोनियां जाण। अंगदें आंसुडितां आपण। नेत्र उघडोनि पाहतां जाण। तंव वानरगण देखिले॥३२॥ मग सावध होवोनियां। सारथियें रथ आणोनियां। रथारोहण करोनियां। युद्ध त्यांसवां मांडिलें॥३३॥ लक्ष्मण वीर जगजेठी। प्रवेशोनि यज्ञवाटीं। युद्धा येतां कडकडाटीं। देखिला दृष्टीं म्यां मेघनादें॥३४॥ त्यासीं छळ करोनि कपटीं। गेलों मेघांचिये पृष्ठीं। हनुमंतानें उठाउठीं। आणिला नेहटीं सौमित्र॥३५॥ लक्ष्मणें आणि आम्हीं। युद्ध मांडिलें रणभूमीं। लक्ष्मणें बाणाक्रमीं। शरीर रणभूमीं पाडिलें॥३६॥ लक्ष्मणें विंधोनि सत्वरी। उभय भुजा छेदिल्या शरीं। एक पडली धरेवरी। लंकेमाझारीं दूसरी॥३७॥ घालितां श्रीरामाची शपथ। तेणें बाणासीं बळ अत्यंत। इंद्रजिताचा शिरःपात। केला निश्चित सौमित्रें॥३८॥ एक भुजादंड उडाला। तो तुजकारणें मूळ[2] धाडिला। शिर रामचंद्रनमनाला। गेलें तुजला कळावें॥३९॥ धड पडिलें निकुंभिळेसीं। शिर नेलें रामचंद्रापासीं। आतां आपल्या सतीत्वासी। प्रकट जनांसी दाखवीं॥४०॥ सतीत्व असेल संपूर्ण। तरी अवलोकावा लक्ष्मण। वंदूनि श्रीरामाचे चरण। शिर आपण मागावें॥४१॥ मी प्राण अर्पूनि लक्ष्मणा। भवसमुद्रपार झालों जाणा। तुझी मार्गप्रतीक्षा सुलोचना। करितों जाण वेगें येईं॥४२॥

वृत्तांत वाचून सुलोचनेचा विलाप : ऐशा पाचबद्ध भूमीवरी। वाचिल्या अक्षरांच्या हारी। तेणें सुलोचना सुंदरी। अंग धरेवरी टाकित॥४३॥ इंद्रजिता तुजविण। मज दाही दिशा झाल्या शून्य। कवणा देऊं आलिंगन। शुभ वचन कोणा बोलूं॥४४॥ मजवांचून तुजला। क्षण वियोग न वचे साहिला[3]। तो तूं आज टाकून मजला। सायुज्यपदाला जाऊं पाहसी॥४५॥ तुजवीण मी अनाथ। शिरी नाहीं मज नाथ। आतां काय हे जीवित। येईन त्वरित तुजपासीं॥४६॥ पुच्छ तुटल्या सापसुरळी। कीं जळावेगळी मासोळी। तेंवी सुलोचना तळमळी। नाहीं ते वेळीं देहशुद्धी॥४७॥ गडबडां भूमीवरी लोळत। नानापरी आक्रंदत। बहुत ग्लानि करित। आक्रोश बहुत मांडिला॥४८॥

सुलोचनेची सहगमनाची तयारी : तंव शांतिमती सखी जाण। आणि विवेक सखा आपण शांतिमती सुलोचनेलागून। विवेका विचारून म्हणे माते॥४९॥ आतां पतिसमागम। सायुज्यपद अति सुगम। प्राप्त होय उत्तम धाम। तो उपाय परम योजावा॥५०॥ ऐसें ऐकतां वचन। सुलोचना विचारी आपण। विना वैराग्यप्राप्तीवीणा रामचरण नातुडती॥५१॥

सुलोचनेचे संपत्तिदान : सांडोनि प्रपंचविलास। सर्व भावीं झाली उदास। गृहधनादि सर्वस्वास। झाली उदास सुलोचना॥५२॥ त्रैलोक्यींची संपत्ती। इंद्रजितीं मेळविली होती।

---

शब्दार्थ : १. सांगाडा, २.बोलावण्याला, ३. सोसवत नसे.

तिची गणना करावी किती। बहु संपत्तिसागर॥५३॥ वस्त्रें ललामें[1] अमोलिक। तयांचे न करवती लेख[2]। सुलोचना मानी ओक। देहसार्थक मांडिलें॥५४॥ आशा तृष्णा कामना॥ यांची बोळवण करून जाणा। निस्पृह झाली सुलोचना। दानधर्मा करूं सरली॥५५॥ जडित मुद्रा अलंकार। मणिमंडित उत्तम हार। इंद्रजिताचें भांडार। वांटी समग्र द्विजांसी॥५६॥ बोलवूनि ऋषी ब्राह्मण। आणि सुवासिनी जाण। वांटिती झाली धन। अपरिमित जाण ते काळीं॥५७॥ करोनि लोभाची बोहरी। न देणें दवडोनि दूरी। कृपणता घालूनि बाहेरी। वांटी सुंदरी सर्वस्व॥५८॥ लोभें धन पुरों जाती। मुळींच त्यांकडे माती। भूमीं निक्षेपली संपत्ती। तोंडी माती पाषाण॥५९॥ तैशी नोहे सुलोचना। सर्व संपत्ती दिधली दाना। देतां उल्लास चौगुणा। वांटिले धना निर्लोभत्वें॥६०॥ दास दासी सेवक। त्यांसी दिधलें यथेष्ट कनक। मागत्यासी नव्हे विमुख। सती चोख सुलोचना॥६१॥ आप्त याचक तृप्त झाले। धन अपरिमित उरलें। नेतां नेववेना उबगले। धन राहिलें तळीं बहुत॥६२॥ मग सुलोचना निजगृहासी। नमस्कारोनि साष्टांगेंसीं। सखिया घेवोनि समागमेंसी। निघे सासूसी भेटावया॥६३॥ सतीपणाचे अळंकारी। पांढरा तोडर गळसरी। हरिद्राकुंकमसिंदूरीं। दिसे सुंदरी घवघवीत॥६४॥ शुभ्र कंचुकी शुभ्र वस्त्र। शुभ्र सुमनांचा शृंगार। तेणें शोभतसे सुंदर। मनोहर पतिव्रता॥६५॥ वाहनारूढ व्हावें जरी। राम न लभे निर्धारीं। याकरितां पादचारी। निजनिर्धारीं चालली॥६६॥ आदरें भुजेच्या पूजना। करोनी भावें प्रदक्षिणा। घालोनियां लोटांगणा। वाहिली जाणा सुखासनीं॥६७॥ करोनियां रामनामस्मरण। सुलोचना निघे आपण। पदोपदीं पतीचें स्मरण। करीत गर्जन वेळोवेळा॥६८॥ आलीं सभामंडपासीं। रावण देखिला मंदोदरीसीं। साष्टांगें करोनि नमनासी। वृत्तांतासी निवेदी॥६९॥ करितां सासूसी नमस्कार। तंव ते आक्रंदली थोर। माझा निमाला ज्येष्ठ कुमर। दुःख दुर्धर घोटेना॥७०॥ ये रे माझ्या ज्येष्ठ सुता। नांवानिगिया इंद्रजिता। लक्ष्मणें तुझिया केलें घाता। मुखही सर्वथा दिसेना॥७१॥ तुझेनि मजला परम सुख। अंती तुझें न देखें मुख। तेणें मज झालें परम दुःख। दुःखदायक संसार॥७२॥ बाणांचिये शेजेवरी। पंहुडलासी अमित्रकरीं[3]। मी तंव निजाची सोयरी। अति दूरी अंतरलें॥७३॥ तुझा आश्रय लंकानाथा। निश्चयेंसी केला होता। रणीं पावलासी घाता। हे दुःखावस्था अनिवार॥७४॥ ऐशी आक्रंदोनि भारी। गडबडां लोळे धरणीवरी। संबोखी सुलोचना नारी। निजविचारीं अति गुह्य॥७५॥ तुम्हीं न करावें खेदासी। अति सत्यत्वें सतीत्वासीं। आजिचेनि सातवे दिवसीं। रावणासीं प्राणांत॥७६॥ मंदोदरी बोले आपण। मजही आहे हें ज्ञान। शिकविलें नायक रावण। कुळनिर्दळण याचेनि॥७५॥

रावणाचा आक्रोश व युद्धावर जाण्याचा आदेश : आश्वासोनि मंदोदरी। येतां सुलोचना बाहेरी। रावण देखोनि शंख करी। दीर्घ स्वरीं आक्रंदे॥७८॥ तिहीं लोकां दुर्धर देख। ज्याचा प्रताप अटक। तो मारिला एकाएक। मनुष्यमशकें लक्ष्मणें॥७९॥ आठवितां पुत्रदुःख। दहाही मुखीं करी शंख। दुःखें तळमळित दशमुख। अधोमुख मूर्च्छित॥८०॥ दुःखें मूर्च्छित दशानना। थापटोनी सुलोचना। करोनियां समाधाना। गुह्य ज्ञाना अनुवादे॥८१॥ संमुख घायीं देतां प्राण। वीर पावती कृतकल्याण। पति पावला ब्रह्मपद पूर्ण। दुःख आपण न करावें॥८२॥ बाणीं श्रीरामशपथवृत्ती। सौमित्राचिये निजहस्तीं। इंद्रजितासी परम गती।

शब्दार्थ : १. दागिने, २. मोजदाद, ३. शत्रूच्या हातांनी.

दुःख तदर्थीं[1] न करावें ॥८३॥ धैर्य धरोनि संपूर्ण। सांडा शोक दुःख रुदन। माझें कांहीं विज्ञापन। सावधान अवधारा ॥८४॥ अहो स्वामी लंकानाथा। श्वशुर आणि माता पिता। तुम्हीच माझे सर्वथा। ऐका आतां वचन माझें ॥८५॥ इंद्रजिताचें शिरकमळ। घेवोनि गेले गोळांगूळ। तें आणोनि द्याल ये वेळ। तरी मज सकल पावलें ॥८६॥ ऐसें बोलतां सुलोचना। आवेश आलासे रावणा। सैन्य पालाणारे[2] पालाणा। सन्नद्ध सेना करा वेगीं ॥८७॥ म्हणे सुलोचने माये। स्वस्थ होवोनियां राहें। इंद्रजिताचें शिर लवलाहें। आतांचि पाहें आणितों ॥८८॥ जिंकोनि सौमित्र रघुनाथ। वधोनियां वानर समस्त। इंद्रजिताच्या शिरासमवेत। भेटी त्वरित पैं येतों ॥८९॥ तंवपर्यंत आपण। स्वस्थ करोनि अंतःकरण। येथें असावें जाण। युद्धाकारणें मी जातों ॥९०॥

मंदोदरीचा उपदेश : ऐसा आविर्भाव जाणून। मंदोदरीनें सुलोचनेलागून। एकांती नेऊनी जाण। ऐशापरी सांगितलें ॥९१॥ रावण बोलतो ज्या गोष्टी। त्या अवघ्या मिथ्या चावटी। तुवां स्वयें जाऊन उठाउठीं। श्रीरामभेटी पैं घ्यावी ॥९२॥ नमोनियां रामचरण। तया जावोनियां शरण। शिर आणोनि स्वहित जाण। आपणाआपण उद्धारीं ॥९३॥ झालियाविना शरणागत। कार्य न साधे त्वरित। आपलें आपण स्वहित। करावें निश्चित साजणी।

इंद्रजिताच्या शिरप्राप्तीसाठी सुलोचनेचे श्रीरामाकडे गमन : ऐसें जाणोनि साचार। स्वयें करावा विचार। दृढ धरोनियां निर्धार। श्रीरघुवीर सेवीं माये ॥९५॥ परस्वाधीन जो होय। त्याचें कार्य कधीं न होय। स्वयें आपण आपली सोय। स्वहित पाहें साधावें ॥९६॥ ऐकोनि मंदोदरीची मात। सुलोचना घाली प्रणिपात। येवोनि नमिला लंकानाथ। आज्ञा त्वरित मागतसे ॥९७॥ मागावया पतीच्या शिरा। भेटूं जाईन श्रीरामचंद्रा। आज्ञा मज द्यावी दशशिरा। तूं सासुरा मजलागीं ॥९८॥ क्षोभें बोले दशशिर। सीताविरहें विरहातुर। तुज देखोनि अति सुंदर। रामचंद्र सोडीना ॥९९॥ ऐकोनि रावणाचें वचन। सुलोचना हास्यवदन। परम भ्रांत दशानन। नेणें महिमान श्रीरामाचें ॥१००॥ श्रीराम परस्त्रीसहोदर। ज्याचें नाम परम पवित्र। नामें पावन चराचर। श्रीरघुवीर परब्रह्म ॥१॥ विकल्प नांदे रावणासीं। विकल्प नाहीं रामासीं। पाप नातळे[3] रघुवीरासी। नाम जगासी तारक ॥२॥ ऐसें बोलतां सुलोचना। मंदोदरी येवोनी जाणा। भेटावया रघुनंदना। आज्ञापना देववी ॥३॥ जाणोनियां भविष्यचिन्ह। आज्ञा देता झाला रावण। मग सुलोचना निघे आपण। रामा नमन करावया ॥४॥ करितां योगयागकोटी। स्वप्नीं नव्हे श्रीरामभेटी। तो श्रीराम आज देखेन दृष्टीं। हर्षे गोरटी चालली ॥५॥ हृदयीं कवळोनि भुजादंड। पादचारी अति प्रचंड। रामनामें गर्जोन वितंड। ध्यान अखंड रामाचें ॥६॥ वाजंत्रांच्या गडगर्जनीं। चालली सत्वशिरोमणी। पदोपदीं ओवाळणी। अक्षय वाणीं नारींची ॥७॥ सवें सखिया सांगातिणी। रामरूप आणोनि ध्यानीं। सुलोचना एकनिष्ठ मनीं। रामस्मरणीं चालली ॥८॥ देखतां श्रीरामाचें कटक[4]। सुलोचनेसीं अति हरिख। आजी माझें भाग्य चोख[5]। रघुकुळटिळक देखेन ॥९॥ जयजयकारें गर्जन। करोनि घाली लोटांगण। वंदावया श्रीरामचरण। कर जोडून राहिली ॥११०॥ वानरीं देखिली सुलोचना। रावणें सीता धाडिली जाणा। सर्वीं करोनि गर्जना। रामराणा नमियेला ॥११॥ वानर म्हणती रामराया। जानकी आदिमाया। रावणें दिधली धाडोनियां। युद्धभया मानूनी ॥१२॥ ऐकोनी वानरांचें वचन। काय बोले रघुनंदन। रावण जीवंत असतां जाण। सीता आपण देखोंना ॥१३॥ पुरता वृत्तांत जाणोनी। कोण येतें विचारोनीं। समस्त

शब्दार्थ : १. त्यासंबंधी, २. तयार करा, ३. शिवत नाही, ४. सैन्य, ५. चांगले.

स्वस्थ होवोनी। अवलोकोनी पहा वेगीं॥१४॥ रामभक्तांसीं पाहीं। पापवासना सर्वथा नाहीं। तंव सुलोचना येत पायीं। रामनाम गर्जत॥१५॥ वानरीं खालत्या केल्या माना। तंव आली सुलोचना। घालोनि रामासीं प्रदक्षिणा। मस्तक भूमीं ठेविलें॥१६॥

**सुलोचनेची श्रीरामांना प्रार्थना :** हनुमंत म्हणे श्रीरघुनाथा। पैल हे इंद्रजिताची कांता। सुलोचना पतिव्रता। वंदनार्था आली असे॥१७॥ तूं तंव कृपाळु रघुनाथ। पुसोनि पूर्ण मनोगत। हिचे पुरवावे मनोरथ। ऐसें हनुमंत बोलिला॥१८॥ श्रीराम म्हणे वो माये। उठीं उठीं वो सये। इच्छा असेल ती बोल स्वयें। पुरवीन जायें निजधामा॥१९॥ ऐसें त्रिवार बोलतां। सुलोचना उठली तत्वतां। हृदयीं भुजादंड असतां। श्रीरघुनाथा स्तवन करी॥१२०॥ जय जय वो श्रीरामा भक्तकामल्पद्रुमा[1]। मी शरण आलें मेघश्यामा। चरणमहिमा कोण जाणे॥२१॥ मी तंव तुज आलें शरण। वानरीं इंद्रजिताचें शिर जाण। आणिले तें देवोनि आपण। सनाथ मजला करावें॥२२॥ भेटवावें सौमित्रा। तो आम्हां स्वानंदसोयरा। द्यावें इंद्रजिताच्या शिरा। विहिताचारा[2] करीन॥२३॥ मी तंव तुझी कन्यका। जामातृशिर देवोनि देखा। बोळवण[3] कीरी रघुनायका। आणीक मी न मागें कांही॥२४॥ ऐसें बोलतां सुलोचना। हृदयीं कळवळला रामराणा। अवलोकोनि वानरसेना। काय वचना बोलत॥२५॥ अहो सुग्रीवा जांबवंता। नळ नीळ अंगदादि तत्वतां। विचार मानला कीं समस्तां। इंद्रजितकांता काय बोले॥२६॥ हे तंव रावणाची सून। आम्हालागीं आली शरण। इंद्रजिताचें शिर देऊन। बोळवण केली पाहिजे॥२७॥ ऐसें बोलतां रघुनाथ। सुग्रीव म्हणे वानरनाथ। सुलोचने तुज वृत्तांत। कैसा त्वरित समजला॥२८॥ शिर आणिलें वानरीं। तुज श्रुत जालें कवणेपरीं। भुजदंड धरिला हृदयावरी। तो झडकरीं दाविला॥२९॥ परिसें वानरनाथा सुग्रीवा। माझे अंगणभूमीवरी बरवा। भुजदंड आला जेव्हां। प्रार्थना तेव्हां म्यां केली॥१३०॥ पाचबद्ध भूमीवरी। वर्तमान लिहिलें सविस्तरीं। तो हा भुजदंड हृदयावरीं। म्हणोनि निर्धारीं दाविला॥३१॥

**सुग्रीवाचे आव्हान :** तंव बोलिला सुग्रीव वीर। तोंडचे तोंडीं समाचार। कोण मानी साचार। ऐक निर्धार सांगतों॥३२॥ शिर प्रत्यक्ष बोलेल। तुझे पातिव्रत्या साक्ष देईल। आम्हां साच मानेल। नाहीं तरी फोलकट[4]॥३३॥ श्रीरामसंज्ञेकरोनी। शिर दिधलें आणोनी। सुलोचना देखोनि नयनीं। हर्षित मनीं पैं झाली॥३४॥ शिर घेवोनियां सन्निध। अंचळें[5] पुसोनि यथाविध। निढळा मिळवोनि निढळ विनोद। बोले सुबद्ध सुलोचना॥३५॥ आसन घातलें पद्मासन। भुजदंड आणि शिर जाण। पुढें मांडीवरी घेऊन। काय आपण बोलत॥३६॥ अहो इंद्रजिता स्वामी। वानरीं तुमचें शिर रणभूमीं। घेऊन आणिलें झेलती व्योमीं। तो राग स्वामी न धरावा॥३७॥ मी तंव तुझी निजदासी। प्रतारणा[6] न करावी मजसी। साक्ष देवोनि वानरांसी। पतिव्रतापणासी साच करीं॥३८॥ वानरीं मांडिली माझी छळणा। तुजवांचून सांगूं कवणा। ऐसें बोलोनि सुलोचना। करी नमना हस्तेंसीं॥३९॥ नानापरी उपचारीं। शिरालागीं प्रार्थना करी। शिर न बोले निर्धारी। मग अंतरीं विचारित॥१४०॥ एका शुद्ध भावावीण। वरपंगी[7] उपचार जाण। करिता न बोले शिर आपण। आतां सतीपण दावूं यांसी॥४१॥ जरी मी सत्य पतिव्रता। असेन साचार तत्वतां। तरी साक्ष देवो माझा भर्ता। श्रीरघुनाथासमक्ष॥४२॥ सबाह्य अभ्यंतरीं आपण। म्हणे मी पतिव्रता असेन। इंद्रजिता तुजवांचून। शेषासमान सर्वही॥४३॥ ऐसा असल्या निर्धार। साक्ष बोलावी प्रखर। बोला अचेतन हें शिर। पतिव्रता साचार सुलोचना॥४४॥

शब्दार्थ : १. भक्तांची इच्छा पूर्ण करणाऱ्या कल्पवृक्षा, २. योग्य आचरण, सती जाणे, ३. पाठवणी, ४. व्यर्थ, ५. पदराने, ६. फसवणूक, ७. वरवर केलेले.

इंद्रजिताच्या शिराचे उत्तर : ऐकतां सतीचें उत्तर। थरथरलें अचेतन शिर। देखतां श्रीरामचंद्र। साक्ष साचार अनुवादे ॥४५॥ जैसा रामचंद्र सत्य सत्य। तैसें सुलोचनेचें पातिव्रत्य। जाणोनियां इत्थंभूत। कार्य निश्चित करीं स्वामी ॥४६॥ ऐशी साक्ष देतां शिर। वानरीं केला जयजयकार। सुखावला श्रीरामचंद्र। चिंतातुर लक्ष्मण ॥४७॥ केवळ अचेतन शिर। साक्ष वदलें पैं साचार। संतोषोनी श्रीरामचंद्र। काय उत्तर बोलत ॥४८॥ रघुनंदन म्हणे सुलोचने। काय इच्छा तें बोलणें। काय मागसी तें देईन सजणे[1]। प्रसन्नवदनें बोलिला ॥४९॥ सुलोचना म्हणे गा श्रीरामा। भक्तकामकल्पद्रुमा। पतिशिर देवोनी आम्हां। पुनर्जन्मा देऊं नको ॥१५०॥ तुझ्या चरणीं अक्षय वास। तुझ्या नामीं दृढ विश्वास। हेंचि देवोनि आम्हांस। निजधामास बोळवीं[2] ॥५१॥ ऐसें मागे सुलोचना। संतोषला रामराणा। पावाल अक्षयी निजभवना। आशीर्वचना जाण माझ्या ॥५२॥ आणीक होवोनि हर्षान्वित। काय बोलला रघुनाथ। आतां उठवीन इंद्रजित। म्हणोनि हस्त उचलिला ॥५३॥ तंव बोलिला हनुमंत वीर। स्वामींनीं हा परोपकार। पुरे करावा विचार समग्र। आतां उदार न व्हावें ॥५४॥ तंव बोलिला लक्ष्मण। हनुमानाचें वचन प्रमाण। स्वामींनीं करोनि आपण। आज्ञापन द्यावें सुलोचने ॥५५॥ सुग्रीव बोले सुलोचनेप्रती। शिर घेवोनि नीघ त्वरितीं। विलंब न करावा ये अर्थीं। जायीं निश्चितीं निजमाये ॥५६॥ ऐसें ऐकतां वचन। शिरा भुजादंड कवळोन। श्रीरामा नमस्कार प्रदक्षिण। करोनि विनवणी करीतसे ॥५७॥

एक दिवस युद्ध स्थगित करण्याची सुलोचनेची श्रीरामांना विनंती : ऐकें स्वामी रघुनाथा। आजिंचा दिवस युद्धवार्ता। आपण न करावी सर्वथा। वानर आपले आंवरावे ॥५८॥ अवश्य म्हणे रघुनंदन। करी सुग्रीवा आज्ञापन। आजिंचा दिवस वानरगण। रणकंदना न जावे ॥५९॥

सुलोचनेचे सहगमन : ऐसें होतां सुलोचना। भुजदंड आणि शिर जाणा। मस्तकीं वाहोनि रणांगणा। निकुंबळें जाणा जाती झाली ॥१६०॥ सर्व सखियांसमवेत। रामनामें गर्जत। चरणचाली निकुंबळेंत। आली जेथ धड होतें ॥६१॥ शिर जोडोनि धडासी। उभय भुजा ठेवोनि समीपेंसीं। अग्निप्रवेशाचे सामग्रींसीं। स्वयें साहित्यासी मांडिलें ॥६२॥ तंव रावणाचे हेरीं। वर्तमान निवेदिलें ते अवसरीं। रावण मंदोदरी सहपरिवारीं। स्वयें झडकरी तेथें आलीं ॥६३॥ रावणें येवोनि आपण। कुंड करोनि चतुष्कोण। आंत चंदनकाष्ठें घालून। त्यास कृशान लाविला ॥६४॥ सुलोचना कुंडासमीप। येती झाली आपेंआप। सतीपणाचें घेऊन रूप। अग्नीसमीप उभी ठेली ॥६५॥ इंद्रजिताचें सर्व शरीर। चितेमाजी सपरिकर। घालोनियां अति सत्वर। अग्नि साचार लाविला ॥६६॥ आपण राहोनि कुंडाजवळी। सतीपणाचीं वाणें तें काळीं। देती झाली वेल्हाळी। सत्या सकळी मिळाल्या ॥६७॥ स्वर्गीं करिती जयजयकार। विमानीं दाटले सुरवर। वन्हि[3] चेतला समग्र। कुंड जाहलें वन्हिमय[4] ॥६८॥ येरी पुजोनि रंगशिळा। कुंडाप्रति प्रदक्षिणा केल्या। उभी राहिली रंगशिळां। चहूंकडे अवला विलोकी ॥६९॥ स्वर्गीं दाटलीं विमानें। सत्याही देखिल्या नयनें। सुलोचनें एकाग्र मनें। करोनि आपण काय करी ॥१७०॥ इंद्रजिताचें निजरूप। ध्यानीं आणिलें आपेंआप। तंव देहभावना निजस्वरूप। आपेंआप विरालीं[5] ॥७१॥ विसरोनियां देहभान। इंद्रजिताच्या स्वरूपीं निमग्न। स्वयें होवोनि आपण। अग्निप्रवेशन करिती झाली ॥७२॥ तंव देदीप्यमान विमानीं। इंद्रजित देखिला नयनीं। उभयतां एके ठायीं होवोनी। सायुज्यसदनीं प्रवेशलीं ॥७३॥ क्षणामाजी दुजी सृष्टी। देखते झाले सर्वही दृष्टीं। देव करिती पुष्पवृष्टी।

शब्दार्थ : १. सुंदरी, २. पाठव, ३. अग्नी, ४. सर्व साहित्यासह, ५. नाहीशी झाली.

जयजयकार बोभाटीं गर्जत ॥७४॥ देव गेले आपल्या स्थाना। लंकावासी जन जाणा। आठवीत सुलोचनेच्या गुणा। आपलाल्या भवना स्वयें गेले ॥७५॥ लंकानाथ आणि मंदादरी। अति आक्रोशें रुदन करी। रावण म्हणे निर्धारीं। ऐकें सुंदरी मंदोदरी ॥७६॥ आजी वडील पुत्र वडील सून। जाली उभयतांची बोळणव। आतां आपणही जाण। सत्वर प्रयाण करावें ॥७७॥ शोक करणें कासयासी। आतां राहणें नाहीं आपणासी। ऐसें बोलोनि सहपरिवारेंसीं। निजभवनासी पैं आले ॥७८॥ ज्या रावणाची संपत्ती। गणितां न गणवे गणती। पुत्रपौत्र[1] बहुसंतती। ऐसा निश्चितीं दुजा नाहीं ॥७९॥ नगरी पाहतां सुवर्णाची। सर्व देव सेवा करिती ज्याची। विपरीत कळा कैसी आजची। एक रावणचि उरला असे ॥१८०॥ तोही मरेल रामबाणें। निदानीं[2] उरेल बिभीषण। ऐसें काळाचें करणें। कोण जाणे कैसें होय ॥८१॥ एका जनार्दना शरण। सुलोचनाग्निप्रवेशन। झालें सकळ निरूपण। सज्जनीं सावधान परिसावें ॥८२॥ पुढें रामरावणांचें युद्ध। होईल आतां सुसंबद्ध। श्रोते परिसोत विविध। निजबोध रावणा ॥८३॥ एकाएकीं एकनाथ। शरणागत भावार्थें। जनार्दनाचें मी अपत्य। लळे समस्त पाळित ॥१८४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सुलोचनाग्निप्रवेशनं नाम एकचत्वारिंशोऽध्यायः ॥४१॥ ओव्या ॥ १८४॥

## अध्याय बेचाळिसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### रावणाच्या रथाचा भंग

**इंद्रजित वधाने रावणाचा क्रोध :** इंद्रजिताचा करोनि घात। सौमित्र विजयान्वित। तें ऐकोनि लंकानाथ। दुःखाभिभूत अति दुःखी ॥१॥ निकुंबळे विवराआंत। लक्ष्मणें जावोनि तेथ। केला इंद्रजिताचा घात। प्रधान सांगत लंकेशा ॥२॥ लक्ष्मणा साह्य हनुमंत। प्रतापें रिघोनि विवरांत। बाहेर काढितां इंद्रजित। मेघपृष्ठपर्यंत वाढला ॥३॥ इंद्रजित मेघपृष्ठीं गर्जत। लक्ष्मण नेवोनि स्वहस्तें तेथ। मेघनादाचा केला घात। साह्य हनुमंत सर्वार्थी ॥४॥ ऐकोनि इंद्रजिताचा घात। रावण महामोहान्वित। सिंहासनातळीं मूर्च्छित। पडे अकस्मात विसंज्ञ[3] ॥५॥ संज्ञा पावोनियां रावण। दहाही मुखीं करी शंखस्फुरण। दीर्घस्वरें करी रुदन। पुत्रनिधान अंतरलें ॥६॥ दुःखें गडबडां लोळे। केश सुटले मोकळे। अश्रुधारा स्रवती डोळे। लाळ गळे दशमुखी ॥७॥ पुत्रशोकें अति संतप्त। नेत्रद्वारा अश्रु स्रवत। क्रोधें गरगरां नेत्र भ्रमत। अवघे पळत अति धाकें ॥८॥ जिकडे जिकडे दृष्टि जाये। तिकडे आगी लागों पाहे। कोपें थरथरां कांपताहें। करावें काय स्मरेना ॥९॥ सर्वेंचि म्हणे इंद्रजिता। तुज गेलिया रे आतां। मज नाहीं कोणी रक्षिता। दुःखावस्था विलपत ॥१०॥ शंखस्फुरणें फुटले ओंठ। रडतां सोकले दहाही कंठ। पुत्रशोकाचें यथेष्ट। दुःख अचाट रावणा ॥११॥ मग बोलिला गर्जोन। इंद्रजिताचा सूड घेईन। रणीं मारीन रामलक्ष्मण। आंगवण पहा माझी ॥१२॥ माझे मारिले थोर थोर। निधडे योद्धे महावीर। सखे बंधु लाडके कुमर। तेंचि दशशिर अनुवादे ॥१३॥

महापार्श्वे विनिहते राक्षसे च महोदरे। निशाचरे महामात्ये विरूपाक्षे निपातिते ॥१॥
विश्रुतेषु च योधेषु कांदिग्भूतेषु सर्वशः। रावणः शोकसंतप्तः कार्यशेषमचिंतयत् ॥२॥
चिंतायित्वा नातिचिरं स्वसैन्यानि निवर्त्य च। सुतं संचोदयामास वाक्यं चेदमुवाच ह ॥३॥

---

**शब्दार्थ :** १. नातू, २, शेवटी, ३. बेशुद्ध होऊन.

निहतानाममात्यानां रुद्धस्य नगरस्य च। दु:खमेवापनेष्यामि हत्वा तौ रामलक्ष्मणौ॥४॥

दु:खे वदे दशकंठ[१]। माझे मारिले भट[२] सुभट। बंधु मारिले अति बळिष्ठ। ज्येष्ठ कनिष्ठ निजकुमर॥१४॥ किती सोसूं दु:ख दारुण। म्हणाल मारिले कोण कोण। ते मी सांगेन अवघे जाण। रणप्रवीण महायोद्धे॥१५॥ महापार्श्व महोदर जाण। निधडा मारिला कुंभकर्ण। प्रहस्त मारिला प्रधान। अकंपन महावीर॥१६॥ वज्रदंष्ट्र विरूपाक्ष। कुंभ निकुंभ धूम्राक्ष। अतिकाय त्रिशिरा मकराक्ष। वीर असंख्य मारिले॥१७॥ देवांतका नरांतका नि:पात। ज्येष्ठ मारिला इंद्रजित। तेणें होऊं पाहे प्राणांत। लंकानाथ तळमळी॥१८॥ पुच्छ तुटल्या सापसुरळी। जळावेगळी मासोळी। तैसा रावण तळमळी। राक्षसकुळी निर्दाळितां॥१९॥ रणीं मारिले नेणों किती। उरली जे सैन्यसंपत्ती। थाकें पळाली दश दिशांप्रती। लंकापति अति दु:खी॥२०॥ मिळोनियां रामलक्ष्मण । माझ्या सुहृदां केलें कंदन। त्या दोघांचा घेईन प्राण। गर्जे रावण आक्रोशें॥२१॥ सांडून सैन्याची आस[३]। घालोनि संग्रामाची कांस। पाचारोनि सारथ्यास। सांगे लंकेश तें ऐका॥२२॥ मिळोनियां वानर नर। सुहृद मारिले समग्र। माझे रोधिलें[४] असे नगर। निशाचर गांजोनी॥२३॥ त्या दोघांचा करावया अंत। स्वयें जातों संग्रामांत। शीघ्र सज्जोनि आणीं रथ। लंकानाथ अनुवादे॥२४॥

कर्मणोस्य हि तौ मूलं भ्रातरौ राघवावुभौ। ययो: प्रशाखा: सुग्रीवो हरयोऽन्ये च यूथपा:॥५॥

फलपूष्पे जनकजा शिला धृष्टश्च मारुति :। मूले हते हतं सर्वं तौ हनिष्यामि संयुगे॥६॥

संग्रामवृक्षाचें मूळ जाण। मुख्य श्रीरामलक्ष्मण। सबळ दिंड[५] तो सुग्रीव जाण। खांद्या संपूर्ण कपिमुख्य॥२५॥ योद्धे वानर शाखा सरळ। जनकजा[६] ते पुष्पफळ। संग्राम वाढवी तें शीळ। जाण केवळ हनुमंता॥२६॥ लाहोनी हनुमंताचें बळ। संग्रामाचें बळशीळ। माझें निर्दळावया कुळ। द्वंद्वी केवळ हनुमंत॥२७॥ रामलक्ष्मणादि समस्त। उणें पडत जेथ जेथ। हनुमान साह्य होय तेथ। अटक[७] कार्यार्थ साधुनी॥२८॥ आतां मी जावोनि आपण। रणीं मारीन रामलक्ष्मण। मूळ छेदिलिया जाण। अवघे जण निमतील॥२९॥ राम सौमित्र निमाल्या पाठीं। हनुमान मरेल उठाउठीं। निमतील वानरांच्या कोटी। निर्वैर सृष्टी करीन॥३०॥ ऐसें बोलोनी रावण। रथीं बैसला आपण। अति क्रोधें क्रोधायमान। गडगर्जन करीतचि॥३१॥

स दिशो दश घोषेण रथेन सहसा भृशम्। नादयन्राक्षसश्रेष्ठो राघवावभ्यवर्तत॥७॥

स विस्फार्य महाचापं किरीटामृष्टकुंडल:। नाम संश्रावयामास जगर्ज च ननाद च॥८॥

ते राक्षसेंद्र तं दृष्ट्वा वानरस्त्रस्तचेतस। शरण्यं शरणं जग्मुर्मनसा पुरुषोत्तम् ॥९॥

ततस्तं राघवो दृष्ट्वा रथस्थं पर्वतोपमम्। विधुन्वानं धनुर्घोरं व्यायतास्यमिवांतकम्॥१०॥

रावणाचे रणांगणावर प्रयाण : घडघडाट रथस्पंदें[८]। दश दिशा कोंदल्या नादें। मी रावण येणें शब्दें। गर्जत ब्रीद्रें स्वयें आला॥३२॥ मुकुट कुंडलें मेखळा। अंगदें कंकणें कंठमाळा। चाप सज्जोनि प्रबळाबळा। रथीं बैसला गडगर्जे॥३३॥ ध्वज पताका छत्र चामर। कवची खड्गी धनुर्धर। संमुख लक्षोनि रामचंद्र। दशशिर चालिला॥३४॥ वानरसेनांचिया थाटी। बाणीं त्रासिल्या कोट्यनुकोटी। कपि पळोनि उठाउठी। रिघालें पाठीं श्रीरामाच्या॥३५॥ वानर धाकत धापत। भेणें चळाचळां कांपत। अभय देवोनि रघुनाथ। पुढें लंकानाथ देखिला॥३६॥ पाचारोनि बिभीषण । स्वयें पुसे रघुनंदन। माझे त्रासित वानरगण। येता कोण तो सांग॥३७॥

आचक्षे महातेजा राघवाय बिभीषण: । दशग्रीवो महातेजा राजा वैश्रवणानुज:॥११॥

भीमकर्मा महोत्साहो रावणो राक्षसाधिप:॥१२॥

---

शब्दार्थ : १. रावण, २. योद्धे, ३. आशा, ४. वेढा घातला, ५. खोड, ६. सीता, ७. फार कठिण, ८. रथाचे आवाजाने.

माझे त्रासित वानर। कवची खड्गी धनुर्धर। कोण येतो निशाचर। सांग सत्वर बिभीषणा ॥३८॥ ऐसें पुसतां रघुनंदन। स्वयें सांगे बिभीषण। अति दुर्धर हा दशानन। राजा जाण लंकेचा ॥३९॥ इंद्रजिताचा झाला घात। पुत्रशोकें अति संतप्त। युद्धा आला लंकानाथ। करित प्राणांत वानरां ॥४०॥ करावया निर्वाणरण[1]। युद्धा आलासे रावण। त्याचें करावया निर्दळण। सज्जीं बाण श्रीरामा ॥४१॥ ऐकोनि बिभीषणवचन। संतोषला रघुनंदन। निर्दळावया दशानन। धनुष्यबाण सज्जिलें ॥४२॥ संमुख लक्षोनि रावण। धनुर्ध्यीं सज्जोनियां बाण। काय बोलिला रघुनंदन। सावधान अवधारा ॥४३॥ विंधोनियां दृढ बाण। घायें मारीन रावण। अभिषिंचीन बिभीषण। रणा संपूर्ण समाप्ती ॥४४॥ माझी दृष्टि पडलिया जाण। लंकेशाचे न वांचती प्राण। रणीं मारीन रावण। प्रतिज्ञा पूर्ण हे माझी ॥४५॥ आजचि रणसमाप्ती। रामराज्य त्रिजगतीं। करावया रघुपतीं। बाण शिर्तीं[2] सज्जिला ॥४६॥ बाण ओढोनि कानाडीं[3]। विंधित अति कडाडीं। रावण येत येतां तोडी। रणनिर्वडी साधूनी ॥४७॥

लक्ष्मण रावणाला सामोरा येतो : बाण विंधितां रघुवीर। ती बाणीं छेदी दशशिर। तेणें क्षोभला सौमित्र। चाप सत्वर सज्जिलें ॥४८॥ सौमित्राचा चापशब्द। तेणें रावण झाला स्तब्ध। सैन्य सेनानी जाले मंद। भय सुबद्ध राक्षसां ॥४९॥ सौमित्रे विंधितां शर। दणाणिला दशशिर। हदादले[3] निशाचर। राक्षसभार खवळला ॥५०॥ लागतां सौमित्राचे बाण। रणीं क्षोभला रावण। संमुख देखोनि लक्ष्मण। काय आपण जल्पत ॥५१॥ घेतला इंद्रजिताचा प्राण। तूं तंव माझा द्वंद्वी[4] पूर्ण। विंधोनियां निर्वाणबाण। तुज धाडीन यमलोका ॥५२॥ मारावया सौमित्रा। रागें कांपत थरथरां। नेत्र भवंडी तो गरगरां। दांत करकरां खातसे ॥५३॥ त्यासी सौमित्र म्हणत। बडबडसी कां खासी दांत । करूनि दाखवीं पुरुषार्थ। तूं लंकानाथ प्रतापी ॥५४॥ बडबड करावया जाण। बहु तोंडीं तोंडाळ दशानन। काहीं न दिसे आंगवण। रणीं रावण तूं नपुंसक ॥५५॥ माझे सुटलिया बाण। ससैन्य मारीन रावण। ऐसें बोलतां लक्ष्मण। दशानन खवळला ॥५६॥

संत्रस्यद्वानरानीकं शरवर्षैर्महाभुजः। रामोऽपि राक्षसश्रेष्ठं शरैरग्न्यर्कसन्निभैः ॥१३॥
ततः प्रवर्तते युद्धं रामरावणयोर्महत्। जीवितांतकरं घोरं परस्परवधैषिणोः ॥१४॥

रावण लक्ष्मण युद्ध : संमुख लक्षूनि लक्ष्मण। रावणें विंधिले दुर्धर बाण। एक एक त्रिधा भेदून। सांडी लक्ष्मण लघुहस्तें ॥५७॥ त्रिधा छेदिले बाण संपूर्ण। तेणें क्षोभला दशानन। लक्ष्मणावरी आपण। कोटी कोटी बाण वर्षला ॥५८॥ लक्ष्मण निवारी जंव बाण। तंव विंधिला बिभीषण। सुग्रीव विंधोनियां जाण। वानरगण त्रासिले ॥५९॥ अग्न्यर्कतेजस्वी[5] बाण। क्रोधें घेवोनि रावण। दशग्रीव गर्जोन। रघुनंदन विंधिला ॥६०॥ येतां रावणाचे बाण। रामें सांडिले छेदून। ते काळीं अति निर्वाण। दोघांही रण मांडिलें ॥६१॥ दोघे वीर विचक्षण। येरयेरांचे घ्यावया प्राण। लघुलाघवें विंधिती बाण। हस्तविंदान दावूनी ॥६२॥

राघवो रावणं संख्ये रावणश्चापि राघवम्। अन्योन्यं विशिखैस्तीक्ष्णैः शरैरभिववर्षतुः ॥१५॥
चेरतुश्चरितं चित्रं मंडले सव्यदक्षिणे ॥१६॥

राम रावणाचे युद्ध : राम उठावला रावणावरी। रावण उठावला रामावरी। युद्ध मांडले जीवावरी। परस्परीं झगटले ॥६३॥ विचित्र मंडळें विचरत। लघुलाघवें बाण विंधित । येरयेरांचा करावया घात। रणीं उन्मत्त मातले ॥६४॥ रावण रणीं रणोन्मत्त। श्रीराम रणीं सावचित्त। दशशिराचा करावया घात। संधि पहात साटोपें ॥६५॥ श्रीरामाची निजगती। न

**शब्दार्थ :** १. अखेरचे युद्ध, २. दोरीवर, ३. कांपू लागले, ४. शत्रू, ५. अग्नी आणि सूर्य यांप्रमाणे तेजस्वी.

पवे मनबुद्धि चित्तवृत्ती। रावण बापुडें तें किती। कैशा रीतीं पावेल॥६६॥ पदाति राम रथी रावण। मंडळें करितां सव्यदक्षिण। रथेंसीं श्रमला दशानन। रघुनंदन नाटोपे॥६७॥ रामरावणांचें शर। आच्छादिती दिनकर। रणीं पाडिती अंधकार। येरां येर न देखती॥६८॥ श्रीरामहस्तींची मुद्रिका । तिचेनि तेजें पैं देखा। श्रीरामा आणि दशमुखा। युद्धाचा आवांका[1] संग्रामीं॥६९॥ परस्परें घ्यावया प्राण। संधी पाहती दोघे जण। दोघे संग्रामी विचक्षण। रणप्रवीण धनुर्वाडे॥७०॥

उभौ च परमेष्वासावुभौ शस्त्रविशारदौ। उभौ शस्त्रभृतां श्रेष्ठावुभौ युद्धे न चेलतुः॥१७॥
एकमेकेन बाणेन त्रिभिस्त्रीन्दशभिर्दश। व्यसृजच्छरवर्षाणि राघवो राक्षसेश्वरः॥१८॥

दोघे धनुर्विद्यानिपुण। दोघे शस्त्रास्त्रप्रवीण। शस्त्र प्रेरणनिवारण। दोघे जण जाणती॥७१॥ एकें छेदिती एक बाण। तीन बाणीं तीन बाण। दाहीं छेदिती दहा बाण। दोघेजण लघुवेधी॥७२॥ अदट दाटुगे वीर धीरें। चपळहस्तें बाणमारें। रणीं न सरती माघारें। दोघे गजरें गर्जोनी॥७३॥ ऐसियामध्यें राजा रावण। दुर्धर सज्जोनियां बाण । लक्षोनियां रघुनंदन। विंधी आपण साटोपें॥७४॥ त्याचे निंवारोनी बाण। रामें विंधिले शर दारुण। रथेंसहित रावण। नेला उडवोन आकाशा॥७५॥ बाणपिसारियाचा वारा। रथ भोंवे गरगरां। रावणें निवारोनियां शरां। रहंवरा थांबविलें॥७६॥ रामें विंधोनियां बाण। रणीं उडविला दशानन। तेणें खवळला रावण। अस्त्र निर्वाण सोडिलें॥७७॥ रावण जपोनि संमत्र। अस्त्र प्रेरिलें आसुर। त्यापासून जीव क्रूर। अति दुर्धर चालिले॥७८॥ वृक जंबुक सिंह व्याघ्र। काक कंक गीध घार। वडवा वरहा महाखर। सर्प विखार धुंधुवात॥७९॥ नीळ नकुळ दंश[2] कुक्कुट। क्रूर श्वापदांचें थाट। श्रीरामावरी अचाट। सोडी दशकंठ अस्त्रयोगें॥८०॥ मारावया रामाराणा। रावण क्रोधें काळियां जाणा। सर्पप्राय विंघी बाणां। आंगवण साटोपें॥८१॥ असुरास्त्र महाघोर। येतां देखोनि अति क्रूर। अचुकसंधानी रामचंद्र। तेणें अग्निअस्त्र सज्जिलें॥८२॥

आसुरेण समाविष्टः सोऽस्त्रेण युधि रावण। ससर्जास्त्रं महोत्साहः पावकं पावकोपमम्॥१९॥
ते रावणशरा घोरा राघवास्त्रेण मोहिताः। विलयं जग्मुराकाशे विनिकृत्ताः सहस्रधा॥२०॥

असुरास्त्र अति क्रूर। चालिले सिंह वृक व्याघ्र । रामें सोडून अग्निअस्त्र। केले समग्र भस्मांत॥८३॥ अस्त्रें निवारोनि अस्त्र। निधडा योद्धा श्रीरामाचंद्र। तें देखोनि दशशिर। क्रोधे दुर्धर खवळला॥८४॥

ततः संत्रस्तवक्त्रस्तु रावणो लोकरावणः। नाराचमालां रामस्य ललाटे प्रत्यमुंचत॥२१॥
रौद्रचापप्रयुक्तां च नीलोत्पलमयीमिव। शिरसा धारयन्रामो न व्यथामध्यगच्छत॥२२॥

माझें अस्त्र निजनिर्वाण[3]। रामें सांडिलें छेदून। तेणें रावण अति दीन। म्लानवदन पैं झाला॥८५॥ असुरास्त्र केलें वृथा। रणीं मारीन रघुनाथा। पांच बाण विंधिलें माथां। लघुलाघवता साटोपें॥८६॥ येतां रावणाचे बाण। राम न करी निवारण। पाहूं पां याची आंगवण। दारुणपण बाणांचें॥८७॥ कमळमाळा मनोहर। तैसे मस्तकीं शोभती शर। व्यथा न पवे श्रीरामचंद्र। निधडा वीर संग्रामा॥८८॥ पुष्पप्राय लागले बाण। तेणें लाजला रावण। जळो माझी आंगवण। रघुनंदन ढळेना॥८९॥ निर्वाणबाणाचा आघात। उघडा अंगी श्रीरामा साहत। माझा न चले पुरुषार्थ। चिंताक्रांत रावण॥९०॥ रावणाचे पांचही बाण। श्रीराममस्तकीं देखोन। सौमित्र क्षोभला दारुण। धनुष्यबाण वाहिलें॥९१॥

---

शब्दार्थ : १. धैर्य, २. मुर्कुटे, ३. अखेरीचे, निकराचे.

एतस्मिन्नंतरे क्रुद्धो राघवस्यानुजो बली। लक्ष्मणः सायकन्सप्त जग्राह परवीरहा॥२३॥
तैः सायकैर्महायोगै रावणस्य महाद्युतेः। ध्वजं मनुष्यशीर्षं च तस्य चिच्छेद वीर्यवान्॥२४॥
सारथेश्चैव बाणेन शिरो ज्वलितकुंडलम्। जहार लक्ष्मणः श्रीमान्नथादाशु पपात च॥२५॥
कृष्यमाणं तु चिच्छेद धनुर्गजकरोपमम्। लक्ष्मणो राक्षसेंद्रस्य पंचभिः पंचपर्वभिः॥२६॥
नीलमेघनिभांश्चास्य सदश्वान्पवनोपमान्। निजघान महावेगान्रावणस्य बिभीषणः॥२७॥

लक्ष्मणाने रावणाचा रथ व सारथी मारिले : धनुष्य वाहोनि लक्ष्मण। गुणीं लाविलें सात बाण। क्रोधें लक्षोनि रावण। विंधी आपण साटोपें॥९२॥ लक्ष्मणबाणांच्या कडाडीं। रावणा पडली झांपडी। काढों विसरला तो वोढी। चेतना वेडी होवोनि ठेली॥९३॥ ध्वज नरशिरसमयुक्त[1]। ब्रीद मिरवी लंकानाथ। तो छेदोनियां त्वरित। संग्रामांत पाडिला॥९४॥ दुसरा येतांचि शर। मुकुट कुंडलें मनोहर। सारथ्याचें छेदोनि शिर। रणीं सत्वर पाडिले॥९५॥ छत्र पताका झल्लरी। मुक्ताफळांच्या माळा थोरी। छेदोनि पाडिल्या धरेवरी। बाणाग्रीं सौमित्रें॥९६॥ लघुलाघवें लक्ष्मण। सव्यापसव्य विंधोनि बाण। रावणाचें धनुष्यबाण। रणीं छेदोन पाडिलें॥९७॥ नीळमेघपडिपाडें[2]। पवनवेगीं जोड्या जोडे। रावणरथाचे घोडे। मारिले रोकडे बिभीषणें॥९८॥

बिभीषणाने रावणाचे घोडे मारिले : बिभीषणें विंधोनि बाण। वारुवांचा घेतला प्राण। तेणें बंधुवरी रावण। काळरूपें पूर्ण क्षोभला॥९९॥ जवळी असतां लक्ष्मण। करूं न शके आंगवण। कुसमुसूनि रावण। उगाच आपण राहिला॥१००॥ निधडा शूर लक्ष्मण। रणीं गांजोनियां रावण। विरथी करोनियां जाण। पायीं संपूर्ण पळविला॥१॥ विजयी झाला सौमित्र। वानर करिती जयजयकार। रामनामाचा गजर। नादें अंबर कोंदलें॥२॥ एका जनार्दना शरण। युद्ध झालें अति निर्वाण। रावणें मारितां बिभीषण। ते शक्ति लक्ष्मण साहेल॥३॥ पुढील प्रसंगी स्वभावता। शक्तिभेदाची येईल कथा। एका जनार्दनीं सरता[3]। अवधान श्रोतां मज द्यावें॥४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणरथभंगापजयो नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः॥४२॥ ओंव्या॥१०४॥ श्लोक॥२७॥ एवं॥१३१॥

पाडिलें ॥९७॥ नीळमेघपडिपाडें । पवनवेगीं जोड्या जोडे । रावणरथाचे घोडे । मारिले रोकडे बिभीषणें ॥ ९८ ॥

बिभीषणानें रावणाचे घोडे मारिले:—बिभीषणें विंधोनि बाण । वारुवांचा घेतला प्राण । तेणें बंधूवरी रावण । काळरूपें पूर्ण क्षोभला ॥ ९९ ॥ जवळी असतां लक्ष्मण । करूं न शके आंगवण । कुसमुसूनि रावण । उगाच आपण राहिला ॥ १०० ॥ निधडा शूर लक्ष्मण । रणीं गांजोनियां रावण । विरथी करोनियां जाण । पायीं संपूर्ण पळविला ॥ १ ॥ विजयी झाला सौमित्र । वानर करिती जयजयकार । रामनामाचा गजर । नादें अंबर कोंदलें ॥२॥ एका जनार्दना शरण । युद्ध झालें अति निर्वाण । रावणें मारितां बिभीषण । ते शक्ति लक्ष्मण साहेल ॥ ३ ॥ पुढील प्रसंगीं स्वभावता । शक्तिभेदाची येईल कथा । एका जनार्दनीं सरता । अवधान श्रोतां मज द्यावें ॥४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणरथभंगापजयो नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥४२॥ ओंव्या ॥ १०४ ॥ श्लोक ॥ २७ ॥ एवं ॥ १३१ ॥

---

## अध्याय त्रेचाळिसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### लक्ष्मणाकडून रावणशक्तींचा भेद

रावणानें क्रोधानें बिभीषणावर शक्ति सोडली:—लक्ष्मणें रणाआंत । ध्वज सारथी छेदून रथ । रावण केला हताहत । संग्रामांत साटोपें ॥१॥ रणीं लक्ष्मणें केला विरथ । तो राग न मानी लंकानाथ । बिभीषणें केला अश्वघात । त्यासी टपत माराव्या ॥ २ ॥ लक्ष्मण झालिया परता । करीन बिभीषणाच्या घाता । तो सोडीना शरणागता । क्षणार्धता न विसंबे ॥ ३ ॥ धीर न धरीच रावण । परता नव्हेचि लक्ष्मण । बिभीषणावरी आपण । अति निर्वाण मांडिलें ॥४॥ घोडे मारितां रावण । वेगीं रथ सांडूनि जाण । माराव्या बिभीषण । करूनि उड्डाण धांविन्नला ॥ ५ ॥ बिभीषण देखोनियां दृष्टीं । दांत खाय सकट ओंठीं । त्याचे नैळीचें रक्त घोटीं । ऐसा दशकंठी क्षोभला ॥ ६ ॥ एके घायें होय शांती । ऐसी अभिमंत्रून शक्ती । सोडिली बिभीषणाप्रती । लंकापतीं साटोपें ॥ ७ ॥ रावणें सोडितां शक्ती । लक्ष्मणें बाणावर्ती । त्रिधा छेदून पाडिली क्षितीं । निजशरणार्थीं रक्षिला ॥ ८ ॥ राखावया बिभीषण । पाठीराखा लक्ष्मण । पाहों न शके रावण । शक्ति छेदून सांडिली ॥ ९ ॥ शक्ति छेदिली लक्ष्मणें । ऐसें देखोनि रावणें । दुसरी शक्ति सज्जिली तेणें । बिभीषण प्राणें घ्यावया ॥१०॥ बिभीषणाचा घ्यावया प्राण । दुजी शक्ति सज्जी रावण । निवारूं जातां लक्ष्मण । दोघे जण मरतील ॥ ११ ॥ शक्ति अनिवार्य दारुण । स्वयें तोलोनि रावण । अनुलक्षोनि बिभीषण । सोडी आपण अति कोपें ॥ १२ ॥ करावया बंधूची समाप्ती । घाव हाणी विसां हातीं । मळयविद्युतुल्य दीप्ती । गगनीं शक्ती कडाडी ॥ १३ ॥ शक्ति अनिवार्य दारुण । जाणोनियां बिभीषण । म्हणे माझे न वांचती प्राण । अचुक मरण मज आलें ॥ १४ ॥ बिभीषण चिंताक्रांत । तंव सौमित्र पावला तेथ । पाठीसीं घालोनि शरणागत । अभयान्वित स्थापिला ॥ १५ ॥ बिभीषणा शरणागता । स्वयें स्मरे रघुनाथा । नामीं नाहीं मरणावस्था । निर्भयता श्रीरामें ॥ १६ ॥ रामनामाच्या अनुवृत्तीं । दोघे स्वानंदें नाचती । तें देखोनि लंकापती । विस्मित चित्तीं पैं झाला ॥१७॥ मी सोडिली दुर्धर शक्ती ।

---

नीलवर्ण. २ समर्थ. ३ नरडीचें. ४ पृथ्वीवर. ५ तेज. ६ निर्भय.

तें मरणभय नाहीं चित्तीं । दोघे स्वानंदें नाचती । निर्भयस्थिति सौमित्र ॥ १८ ॥ नर वानर नामांकित । मरणभया नाहीं भीत । तें देखोनि लंकानाथ । अति विस्मित पैं झाला ॥ १९ ॥

दोन वेळां रावणानें सोडलेल्या शक्ति लक्ष्मणानें निवारिल्याः— अगाध नामाचें महिमान । पुढील कथानुसंधान । श्रोतीं द्यावें अवधान । शक्तिनिवारण सौमित्रें ॥ २० ॥ बिभीषणाच्या निजघातीं । रावणें सोडिली जे शक्ती । सौमित्रें नेली भस्मांतीं । तेही युक्ती अवधारा ॥ २१ ॥ यक्षिणीवटींची मुख्य शक्ती । ते लक्ष्मणा वशवर्ती । शक्तीनें निवारिली शक्ती । पाडिली क्षितीं दुखंडें ॥ २२ ॥ राखावया शरणागत । सौमित्र सदा सावचित्त । तेणें क्षोभला लंकानाथ । येणें भ्रातृघात चुकविला ॥ २३ ॥ येणें शक्तिपातें जाण । निःशेष मरावा बिभीषण । आडवा येवोनि लक्ष्मण । शक्तिच्छेदन तेणें केलें ॥ २४ ॥ आधीं मारीन लक्ष्मण । मग मारीन बिभीषण । ऐसें आक्रोशे रावण । शक्ति निर्वाण काढिली ॥ २५ ॥ जिचें नांव ब्रह्मशक्ती । जे निवारेना रघुपती । सौमित्राच्या निजघातीं । निर्वाणार्थी सोडित ॥२६॥ विमुख करोनि माझी ख्याती । भस्म केल्या दोन्ही शक्ती । तेणें क्षोभला लंकापती । ब्रह्मशक्ती सोडित ॥ २७ ॥ नानापरींच्या दुर्धरा युक्तीं । मयें[१] केली मायिक शक्ती । ते न चले श्रेष्ठ सुरवरांप्रती । लंकापति सचिंत ॥२८॥ तेणें प्रार्थिला प्रजाप्रती । मागितली ब्रह्मशक्ती । अनिवार्य त्रिजगतीं । ब्रह्मवरदोक्ती दुर्धर ॥ २९ ॥

रावणानें ब्रह्मशक्ति लक्ष्मणावर सोडिली :— ब्रह्मा म्हणे रावणा । शक्ति सर्वांच्या घेईल प्राणा । अवतारपुरुषीं जाणा । बाधकपणा चालेना ॥ ३० ॥ अवतारपुरुषाप्रती । माझी बाधेना ब्रह्मशक्ती । प्राण न घेववे तिचेनि निश्चितीं । त्याचेनि शक्ति संपेल ॥ ३१ ॥ ज्यावरी शक्ति प्रेरणें । तेणें जीवें नाहीं वांचणें । ऐसी ब्रह्मशक्ति रावणें । लक्ष्मणाकारणें सज्जिली ॥ ३२ ॥ शक्तीनें मारावा बिभीषण । तो सौमित्रें वांचविला आपण । संमुख लक्षोनि लक्ष्मण । काय रावण बोलत ॥ ३३ ॥ शक्ति निवारून जाण । त्वां वांचविला बिभीषण । आतां तुझा घेईन प्राण । शक्ति दारुण सोडूनी ॥ ३४ ॥ शक्ति सोडीन दारुण । तिसीं न चले निवारण । हृदय भेदून संपूर्ण । घेवोनि प्राण येईल ॥ ३५ ॥ माझे शक्तीचा आघात । चुकविल्या कळेल पुरुषार्थ । ऐसें बोलोनि लंकानाथ । शक्ति सोडित साटोपें ॥ ३६ ॥ शक्तितेजाच्या कडाडीं । उभय सैन्या पडे झांपडी । प्रळयविजूच्या पडिपाडीं । गगन गडाडी गडगजें ॥ ३७ ॥ सौमित्र आणि रघुनाथ । तिसरा वीर हनुमंत । यांचींचि नेत्रें सावचित्त । येर मूर्च्छित शक्तितेजें ॥ ३८ ॥ शक्ति देखोनि दुर्धर । लक्ष्मणयोद्धा वीर धीर । डंडळीना अणुमात्र । सज्जोनि शर छेदित ॥ ३९ ॥ शक्ति कडाडितां गगनीं । लक्ष्मणें विंधोनि बाणीं । शतधा सांडिली छेदूनी । घातली पिटोनि निरालंबी ॥ ४० ॥ ब्रह्मशक्ति अति निर्वाणीं । गगनीं[२] येतां कडाडूनी । लक्ष्मणाच्या संरक्षणीं । कृपावचनीं वदे राम ॥ ४१ ॥

श्रीरामांनीं ब्रह्मशक्ति क्षीण करून परतवून लाविली:—श्रीरामदृष्टीं अवलोकन । शक्तीची शक्ति केली क्षीण । ब्रह्मशक्तीसी देवोनी मान । राखिली निर्वीर्यत्वें ॥ ४२ ॥ श्रीरामें शक्ति केली क्षीण । त्यावरी लक्ष्मणें विंधितां बाण । शक्ति पडत पडतां जाण । झेली रावण साटोपें ॥ ४३ ॥ तूं ब्रह्मयाची ब्रह्मशक्ती । निष्फळ कैंवी पडसी क्षितीं । रावणें घेवोनि हातीं । हाणी पुढती सौमित्रा ॥ ४४ ॥ जवळून शक्ति हाणितां जाण । लक्ष्मण विंधील तीव्र बाण । येणें भेणें रावण । हाणी आपण दुरोनी ॥ ४५ ॥ रावणें शक्ति घेवोनि हातीं । आपुलिया

---

१ मयासुरानें, हा रावणाचा सासरा.

२ आकाशांत.

सर्वशक्तीं । सोडिली सौमित्राप्रती । सकोपवृत्तीं साटापं ॥ ४६ ॥ अंगबळें जांघबळें । बाहुबळें प्रतापशीळें । शक्ति सोडितां रणकल्लोळें । गगना उसळे कडकडित ॥ ४७ ॥ लक्ष्मण वीर अति निधडा । कदा न सरे मागांपुढां । शक्ति छेदिली तडतडां । निजकुऱ्हाडा विंधोनी ॥ ४८ ॥ मयासुरें निर्मिली होती । जे ते छेदिली बाणावर्ती । उरली केवळ ब्रह्मशक्ती । ब्रह्मवरदोक्ती अनिवार्य ॥ ४९ ॥ शक्ति येतांच संपूर्ण । लक्ष्मणें विंधोनि बाण । सत्यलोकावरती जाण । उडवी आपण साटोपें ॥ ५० ॥ शक्ति निजबळें येऊं पाहे । लक्ष्मण बाणीं पिटीत जाये । शक्ति उसणें घेवों न लाहे । दुर्धर घाये हाणित ॥ ५१ ॥ शक्ति तळपोनि गुप्तगतीं । अंगीं आदळावया पैं ठपती । लक्ष्मणें खड्ग घेवोनि हातीं । उडविली मागुती सत्यलोका ॥ ५२ ॥ खड्गघायाच्या खणाणीं । शक्ति छेदितां रणांगणीं । ठिणग्या उसळल्या गगनीं । जेंवी तारागणीं नभशोभा ॥ ५३ ॥ लक्ष्मण असतां सावचित्त । होऊं न शके शक्तिपात । हें जाणोनि लंकानाथ । करी छळणार्थ तें ऐका ॥ ५४ ॥ लक्ष्मणवीर अति गाढा । अचुकसंधानीं नित्य निधडा । शक्ति येऊं नेदी अंगाकडा । लाविलें वेडा लंकेशा ॥ ५५ ॥

श्रीरामवधाची खोटी बातमी रावण उठवितोः– लक्ष्मण पडावया दुश्चित । छळण करी लंकानाथ । रणीं मारिला रघुनाथ । राक्षस गर्जत अति गजरें ॥ ५६ ॥ रावणाच्या निजबाणीं । राम पडिला रणांगणीं । लक्ष्मणें ऐकतां हे वाणी । काया वाचा मनीं विकळ गेला ॥ ५७ ॥ मन झालें सचिंत । धनुष्यीं विकळ गेला हात । रामविरहें अति दुश्चित । तंव शक्तिपात आदळला ॥ ५८ ॥

दुश्चित लक्ष्मणावर शक्तीचा प्रहार :– शक्ति भेदतां हृदयासी । रामस्मरण सौमित्रासी । शक्तिभेद झाला हृदयासी । वरकांतीसीं लागली ॥ ५९ ॥ जेथं श्रीरामाचें स्मरण । तेथें सर्वदा न रिघे मरण । शक्ति बापुडी ते कोण । वरकांती जाण लागली ॥ ६० ॥ हृदयीं लागतांचि शक्ती । लक्ष्मण विकळ पडला क्षितीं । तें देखोनि रघुपती । कृपानुवर्ती गहिंवरला[2] ॥ ६१ ॥

क्रोधाविष्ट श्रीरामांचा रावणावर बाणांचा वर्षावः– आसवें स्रवती लोचन । राम झाला विषण्णवदन[1] । लक्ष्मणाचा गेला प्राण । काय आपण करावें ॥ ६२ ॥ लक्ष्मण रणीं पडल्या जाण । श्रीरामासी दुःख दारुण । अश्रुधारा स्रवती नयन । सबाष्प वचन बोलत ॥ ६३ ॥ तेंचि काळीं रघुनाथ । क्षण राहोनियां ध्यानस्थ । लक्ष्मणा नाहीं जीवघात । जाणोनि युद्धार्थ आरंभी ॥ ६४ ॥ रणीं मारावया रावण । काळकृतांत प्रळयाग्नि पूर्ण । तैसा खवळला रघुनंदन । धनुष्यीं बाण सज्जूनी ॥ ६५ ॥ येतां श्रीरामाचे बाण । त्यांसीं न चले निवारण । तेणें गजबजिला रावण । पळे आपण अति धाकें ॥ ६६ ॥ लक्ष्मणाचे क्षोभें जाण । रामें मांडिलें निर्वाण । विंधितां बाण घेईल प्राण । धाकें रावण पळे दुरी ॥ ६७ ॥

रावणाचें पलायनः– पळोनियां उठाउठीं । गुप्त राहतां सैन्यगोठीं । तरी रावण धाके पोटीं । रामशरवृष्टी साहवेना ॥ ६८ ॥ जैसा कां चंडवात । मेघां करीत हताहत । तैसा रावण सैन्याआंत । स्वयें पळत अति धाकें ॥ ६९ ॥ श्रीरामवीर जगजेठी । न लागे पळतयापाठीं । रावण निजसैन्याचे गोठीं । अति संकटीं राहिला ॥ ७० ॥ श्रीरामें नेम केला आपण । रणीं मारावा रावण । रावण सैन्यीं राहिला लपोन । आपणा आपण वांचविलें ॥ ७१ ॥ रणीं असतां लंकानाथ । विषादकाळ नव्हे येथ । सौमित्र करावा सावचित्त । हाचि पुरुषार्थ पैं आम्हां ॥ ७२ ॥

तं ददर्श तदा रामः शक्त्या निर्भिन्नमाहवे ।
लक्ष्मणं रुधिरादिग्धं सपन्नगमिवाचलम् ॥ १ ॥

---

१ तोंड उतरलेला.

२ गहिंवरून. वरकांती = दिव्याउ

सौमित्रिं चैव सा भित्त्वा विवेश धरणीतले ।
तां कराभ्यां परामृश्य रामः शक्तिं भयावहाम् ॥२॥
बभंज समरे क्रुद्धो बलेनापचकर्ष च ।
तस्य चाकर्षतः शक्तिं माराचान्दीप्ततेजसः ॥३॥
निचखान दशग्रीवः सर्वगात्रेषु वीर्यवान् ।
अचिंतयित्वा तान्बाणान्समुत्थाय स लक्ष्मणम् ॥४॥
अब्रवीच्च हनूमन्तं सुग्रीवं चैव वानरम् ।
लक्ष्मणं संपरिष्वज्य नीत्वा चैव स्वमालयम् ॥५॥
अस्मिन्मुहूर्ते न चिरात्सत्यं प्रतिशृणोमि वः ।
अरावणमरामं वा जगद्द्रक्ष्यथ वानराः ॥ ६ ॥

लक्ष्मणाच्या देहांतील शक्ति उपटून लक्ष्मणाची शिबिरांत पाठवणी :—रावण लपोनि रणमेळीं । राम येवोनि सौमित्राजवळी । शक्ति भेदूनि हृदय-कमळीं । धरातळीं प्रवेशली ॥७३॥ जैसा सर्प प्रवेशे वारुळीं । तैसी शक्ति भेदली हृदयकमळीं । तें देखोनि तये वेळीं । राम कळवळी बंधुस्नेहें ॥७४॥ राम कृपाळु संपूर्ण । शक्ति उपडावया जाण । वांचवावया लक्ष्मण । करी स्पर्शन अमृत-हस्तें ॥७५॥ शक्ति भेदली हृदयांत । तिसी श्रीरामें लावोनि हात । स्वयें उपडूं पाहत । बहुत वर्जित नाना युक्ती ॥७६॥ शक्ति उपडितांचि जाण । लक्ष्मणाचा जाईल प्राण । एक म्हणती ऐसें आपण । सर्वथा जाण न करावें ॥७७॥ बाप कृपाळु रघुपती । त्यांच्या उपेक्षोनि नाना युक्ती । शक्ति उपडी निजहस्तीं । कृपामूर्ति कृपाळु ॥७८॥ श्रीरामें लावितांचि हात । शक्ति झाली वीर्यहत । लक्ष्मण मारावयाचें सामर्थ्य । हताहत होवोनि गेलें ॥७९॥ ब्रह्मवरदोक्ती पुरती । हृदयीं रुतली ब्रह्मशक्ती । ते श्रीरामें धरोनि हातीं । स्वलीला युक्तीं छेदिली ॥८०॥ शक्ति उपडितां रघुनंदन । ते संधि साधोनि रावण । श्रीरामावरी वर्षे बाण । अति दारुण साटोपें ॥८१॥ रावणाचे येतां बाण । राम मानी तृणासमान । स्वहस्तें उठवोनि लक्ष्मण । दे आलिंगन अति प्रीतीं ॥८२॥ हनुमान सुग्रीवादि जाण । पाचारोनि वानरगण । श्रीराम सांगे आपण । न्यावा लक्ष्मण स्वस्थाना[१] ॥८३॥ ग्रीष्मांतीं चातकासी । मेघ निववी जीवनेंसीं । तेंवी निववावें लक्ष्मणासी । तंव रावणासी मी वधीन ॥८४॥

राम-रावण युद्ध :—आजी प्रतिज्ञेचें माझें रण । पृथ्वी देखाल अरावेण[२] । कीं अराममय[३] जाण । जग संपूर्ण देखाल ॥८५॥ रामनामीं न ये मरण । तो राम कैंवी मरे आपण । रणीं निमाला रावण । अवघे जण देखाल ॥८६॥ राम जगाचा आत्माराम । जेथें न रिघे जन्ममरण । रावणासीं मरणधर्म । अलोट मरण पैं आलें ॥८७॥ राम चैतन्यविग्रही । राम देहीच विदेही । राम द्वंद्वातीत पाहीं । राम ठायींच्या ठायीं परब्रह्म ॥८८॥ रामेंवीण सर्वथा । तिळभरी ठाव नाहीं रिता । मिथ्या जन्ममरणवार्ता । पुढील कथा अवधारा ॥८९॥ शिबिरीं[४] धाडो लक्ष्मण । बाणें विंधितां रावण । त्यावरी श्रीराम आपण । क्षोभला दारुण शरवृष्टीं ॥९०॥ ज्यालागीं सुग्रीवा राज्यदान । ज्यालागीं आणिले वानरगण । तो मारीन आजि रावण । निर्वाणबाण विंधोनी ॥९१॥ ज्यालागीं आणोनि पाषाण । समुद्रीं केलें सेतुबंधन । तो मारीन रावण । निर्वाणबाण विंधोनी ॥९२॥ माझिया युद्धाचा चमत्कार । देखोत सुर नर किन्नर । सिद्ध चारण विद्याधर । देखोत समग्र सुर सिद्ध ॥९३॥ रामें करोनि दुर्धर रण । मारिला अति गर्वी रावण । पुढें पृथ्वीवरी जाण । हें पढती पुराण सुरसिद्ध ॥९४॥ ऐसें बोलोनी रघुपती । सुवर्णपुंखी भल्ल हातीं । सतेज घेवोनि धगधगीती । लंकापती विंधिला ॥९५॥ रावणें सज्जोनि बाण । रणीं विंधिला रघुनंदन । समूळ नाराच[५] शर दारुण । विंधी आपण लघुवेगें ॥९६॥ सुटलें दोहींचें शरजाळ । भूतळ आणि अंतराळ । बाणीं कोंदलें दिग्मंडळ । कुळाचळ कोंदले ॥९७॥

१ उदकानें. २ रावणरहित. ३ रामरहित. ४ छावणींत. ५ एक प्रकारचे बाण.

अलोट = निश्चीत

दोघे वीर अति उद्भट । बारया वाहों न देती बाट । शस्त्रें हाणितां खणखणाट । हव्यवाट ऊठिला ॥ ९८ ॥ शस्त्रें हाणितां बळोन्मेळीं । ठिणग्या उठती अग्निकल्लोळीं । बाण जळती अंतराळीं । आतुर्बळी रणयोद्धे ॥ ९९ ॥ श्रीरामाचे दुर्धर बाण । निवारूं न शके रावण । भेदोनियां अंगत्राण । अंगीं संपूर्ण आदळती ॥ १०० ॥

श्रीरामांनीं रावणाचें धनुष्य, कवच, रथ व अश्व यांचा छेद केलाः—धनुष्य छेदिलें हातींचे हातीं । रथींचा मारिला सारथी । रथींचे वारु पाडिले क्षितीं । केला विरथी लंकेश ॥ १ ॥ छत्रपात मुकुटपात । ध्वजपात रथपात । पांचवा झाला कळापात । रणीं रघुनाथ खवळला ॥ २ ॥ छेदावया दशकंठी । रामें शर सज्जिले नेटीं । तंव रावणें देवोनि पाठी । उठाउठीं पळाला ॥ ३ ॥ रणीं मारावा लंकानाथ । निर्वाण नेमें आला रघुनाथ । रावण पळोनी बुद्धिवंत । जीवघात चुकविला ॥४॥

> संकीर्यमाणः शरजालवृष्टिभि-
> र्महात्मना दीप्तधनुष्मता रणे ।
> भयात्प्रदुद्राव समेत्य रावणो-
> यथानिलेनाभिहतो बलाहकः ॥ ७ ॥

रावणाचें लंकेमध्यें पलायनः—रामें मारावें रावणासी । रावणाची बुद्धि कैसी । पळोनियां रणभूमीसीं । आपआपणासी वांचविलें ॥ ५ ॥ राम न मारी पळत्यासी । हें कळलें आहे रावणासी । पळोनियां लागवेगेंसीं । आपआपणासी वांचवी ॥ ६ ॥ रामबाणीं जर्जरीभूत । रावण झाला हतांहत । कांहीं न चले पुरुषार्थ । मागें पळत अति धाकें ॥ ७ ॥ लंकेचा जो लंकानाथ । अपमानला रणाआंत । मोकळ्या केशीं पायीं पळत । घायीं कुंथत अति दुःखी ॥ ८ ॥ मेघ उडती चंडवातें । गज पळती सिंहाभिघातें[1] । गरुड पळवी सर्पांतें । तेंवी रावणातें श्रीराम ॥ ९ ॥ यापरी स्वयें रावण । सांडून गेला रणांगण । पुढील कथानुसंधान । सावधान अवधारा ॥१०॥ एका जनार्दना शरण । रणीं पळोन रावण । उठवावया लक्ष्मण । कृपाळु पूर्ण परतला ॥ ११ ॥ राम स्वानंद कृपाळु । राम सप्रेम स्नेहाळु । राम स्वयें दीनदयाळु । प्रणतपाळु[2] श्रीराम ॥ ११२ ॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणशक्तिभेदो नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥४३॥ ओंव्या ॥ ११२ ॥ श्लोक ॥ ७ ॥ एवं ॥ ११९ ॥

---

## अध्याय चव्वेचाळिसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### औषधि आणण्याची हनुमंताला प्रार्थना

रणीं दंडोनि रावणासी । सावध करावें सौमित्रासी । राम आला अति स्नेहेंसीं । जीवीं जीवासीं जीवन ॥ १ ॥ राम जगाचें जीवन । राम जीवाचें चिद्धन । सखा आत्माराम आपण । राम परिपूर्ण परब्रह्म ॥ २ ॥ तोचि राम स्वयें आपण । वांचवावया लक्ष्मण । कृपाळु संतुष्टला संपूर्ण । त्यासीं कल्पांतीं मरण असेना ॥ ३ ॥ राम निजज्ञानें अति समर्थ । तोही वानरांचे विचारांत । अनुसरला स्वयें वर्तत । अनुचरित लक्ष्मूनी ॥ ४ ॥

> विश्रम्य स्वस्थमालोक्य सुषेणं राघवोऽब्रवीत् ।
> एष रावणवेगेन लक्ष्मणः पतितो भुवि ॥ १ ॥
> सर्पवच्चेष्टते वीरो मम शोकमुदीरयन् ॥ २ ॥

लक्ष्मणाला मूर्च्छा आणि रामांचा शोकः—भूत भविष्य वर्तमान । सर्वही जाणे रघुनंदन । तरी मनुष्यनाट्यविडंबन । स्वयें आपण दावित ॥५॥ विकळ देखोनि लक्ष्मण । जाणोनि भविष्याचें चिन्ह । वृथा करी विलपन । तेंही लक्षण अव-

---

१ सिंह प्रहार करील या भीतीनें.

२ शरणागताचें रक्षण करणारा.



हव्यवाट = अग्नी
अनुचरित = सोबती, सेवक

धारा ॥ ६ ॥ लक्ष्मण देखोनी रुधिरोक्षित । धरोनी सुषेणाचा हात । बंधुस्नेहें कळवळीत । काय बोलत श्रीराम ॥ ७ ॥ प्राणांपरीस अधिक जाण । सखा बंधु लक्ष्मण । मज एकलें सांडून । स्वयें प्रयाण मांडिलें ॥ ८ ॥ सखे बंधु दोघे जण । येरयेरांचा आश्रय धरोन । वना निघालों आपण । पितृवचन पाळावया ॥ ९ ॥ वचन ऐकें सुषेणा । लक्ष्मणें वेंचलिया प्राणां । मज चाड नाहीं निजप्राणां । येरां जणां काय चाड ॥ १० ॥ बुडालें धैर्य वीर्य । बुडालें माझें परम शौर्य । बुडालें यश सर्व । बंधु स्वयमेव अंतरला ॥ ११ ॥ बुडाली माझी धृति कीर्ती । बुडाली माझी शौर्यशक्ती । बुडाली माझी परम ख्याती । बंधु निश्चितीं अंतरला ॥ १२ ॥ नेत्रां येतसे अंधारी । गात्रें कांपती थरथरीं । धनुष्य न धरवे करीं । धीर निर्धारीं न धरवे ॥ १३ ॥ प्राण जाती विकळ । मति न स्मरे अळुमाळ । वाचा जातसे बरळ । शरीर चळचळ कांपत ॥ १४ ॥ आतां मज युद्धाचें कार्य कोण । यश कोण घे आपण । कोण कार्य बधून रावण । बंधु लक्ष्मण अंतरला ॥ १५ ॥ चाड नाहीं विजयवृत्ती । चाड नाहीं धृतिगती । चाड नाहीं यशकीर्ती । बंधु निश्चितीं अंतरला ॥ १६ ॥ जीविताची चाड कोण । उम्यात्र मी सांडीन प्राण । या जिण्याचें सुख कोण । बंधु लक्ष्मण अंतरला ॥ १७ ॥ धांव पाव रे लक्ष्मणा । कां करितोसी प्रयाणा । मज सोडोनि दीनवदना । कोण्या स्थाना जातोसी ॥१८॥ वनीं मी पिडलासी रे उपवासीं । म्हणोनियां रुसून जातोसी । कीं युद्ध करितां भागलासी । म्हणोनि जासी विसांवया ॥ १९ ॥ इंद्रजितासारिखा रणयोद्धा । रणीं श्रमलासी तूं करितां द्वंद्वा । कीं सीता बोलली अपवादा । त्या विषादा मानिलें ॥ २० ॥ लक्ष्मणा ये रे ये रे । परतोनि मज भेटी दे रे । मजवरी रुसलासी कां रे । दोघेही वनींचे सांगाती ॥२१॥ तुजवीण न घें जीवन । सर्वथा न सेवीं अन्न । न करीं अयोध्यागमन । उम्यां प्राण सांडीन ॥२२॥ सीता न लगे मज सर्वथा । काय तोंड दाखवूं त्या भरता । काय उत्तर देऊं तिघी मातां । बंधु सर्वथा अंतरला ॥ २३ ॥ शत्रुघ्न मज पुसेल जेव्हां । काय मी मुख दावूं तेव्हां । गेला सर्व सुखाचा ओलावा । जीवीं जीवा आकांत ॥ २४ ॥ म्हणवोनि घातली लोळणी । अंग टाकिलें धरणीं । लक्ष्मणें मोकलिलें रणीं । कोण शिराणी जिण्याची ॥ २५ ॥ वक्षःस्थळ पिटी हातें । डोयी पिटी धरणीतें । विकळ जातां सर्व सामर्थ्यें । सुषेणें तेथें धरियेलें ॥ २६ ॥ महामेरु कडाडितां । कीं धैर्याचा स्तंभ पडतां । कीं तारूं समुद्रीं बुडतां । झाला राखता सुषेण ॥ २७ ॥ मरतया अमृतपान । कीं दुकाळिया मिष्टान्न । कीं अवर्षणीं वर्षे घन । तेंवी वचन सुषेणाचें ॥ २८ ॥

राममेवं ब्रुवाणं तु शोकविह्वलितेंद्रियम् ।
आश्वासयन्नुवाचेदं सुषेणः परमं वचः ॥ ३ ॥

त्यजेमां नरशार्दूल बुद्धिवैक्लव्यकारिणीम् ।
शोकसंजीविनी चिंता बाणैस्तुल्या चमूमुखे ॥ ४ ॥

नैव पंचत्वमापन्नो लक्ष्मणो लक्ष्मिवर्धनः ।
न ह्यस्य विकृतं वक्त्रं नैव श्यामत्वमागतम् ॥५॥

सुप्रभं च प्रसन्नं च मुखमस्य निरीक्ष्यताम् ।
पद्मपत्रनिभौ हस्तौ सुप्रसन्ने च लोचने ॥६॥

नेदृशं दृश्यते रूपं गतासूनां विशांपते ।
विषादं मा कृथाः शूर सप्राणोऽयमरिंदम ॥७॥

पश्य चास्य प्रसुप्तस्य स्वस्थगात्रस्य भूतले ।
सोल्लासं हृदयं वीर कंपमानं मुहुर्मुहुः ॥ ८ ॥

**सुषेणाचें श्रीरामांना आश्वासनः—** ऐकें स्वामी रघुनंदन । तूं सर्वदा पैं सावधान । बंधुवैक्लव्यवासना जाण । क्षणीं मना धरितोसी ॥ २९ ॥ उभा राहोनि चमूमुखासीं । चिंतेचे बाण हृदयीं

१ रक्तानें भरलेला. २ रागाला. ३ उदक. ४ कौतुक. ५ बंधुनाशाची कल्पना.

घेसी। तेणें अत्यंत दुःखी होसी। ऐसें मानसीं न धरावें ॥ ३० ॥ नाहीं पंचत्व[1] पावला। नाहीं याचा प्राण गेला। जीवनश्रियेनें[2] असे भरला। नाहीं निभाला[3] सर्वथा ॥ ३१ ॥ विशीर्ण न दिसे याचें वदन। नाहीं पालटलें देहचिन्ह। नाहीं काळिमा चढली जाण। जीवें लक्ष्मण जीत असे ॥ ३२ ॥ श्रीरामा पाहें सावधान। सुप्रसन्न याचें वदन। पद्मदळासारिखें जाण। मुखचिन्ह दिसताहे ॥ ३३ ॥ सुकुमार याचें करकमळ। शीतळ न लागती चरणतळ। टवटवीत नेत्रयुगळ। लक्ष्मण विकळ नाहीं रामा ॥ ३४ ॥ प्राणहीन पैं शरीर। याचें न देखों साचार। सावधान याचीं गात्रें वक्त्र। शेषावतार हा होय ॥ ३५ ॥ सावध ऐकें रघुनंदना। अरिगजसैन्यपंचानना। राक्षसकुळनिर्भंजना। बंधुरत्ना भय नाहीं ॥ ३६ ॥ शक्तिभेदें लक्ष्मण। पडला असतांही जाण। सर्वथा नाहीं विसंज्ञ। तेंही चिन्ह अवधारीं ॥ ३७ ॥ जरी दिसताहे विकळ। तरी पाटव्य असे प्रबळ। धुकधुकीत नेत्रकमळ। अळुमाळ दिसताहे ॥ ३८ ॥ सर्वथा यासीं भय नाहीं। हें मी जाणतसें पाहीं। प्रतिज्ञा करितों तुझे पायीं। भय नाहीं लक्ष्मणा ॥ ३९ ॥ मी जाणतसें वैद्यक। प्रेतचिन्ह आवश्यक। सौमित्रा भय नाहीं देख। प्रतिज्ञा सुटंकें[4] वदतसें ॥ ४० ॥ शक्ति भेदली हृदयसंधीं। त्यासीं उपाय ऐक कृपानिधी। एक वेळां आणोनि दिव्यौषधी। बंधु सुबुद्धि वांचवीं ॥ ४१ ॥ म्हणसी औषधि येते कैसेन। त्या उपायासी सांगेन। एक वेळां प्रार्थून वायुनंदन। ओषधि जाण आणाव्या ॥ ४२ ॥ जंव नव्हे सूर्योदयो। तंव ओषधि आणाव्या पहाहो। उदया येतां कश्यपतयो। कार्यान्वयो साधेना ॥ ४३ ॥ उदया येतां गभस्ती। ओषधि प्राप्त नव्हती। आणि अनावर ब्रह्मशक्ती। ऊर्मिळापती न वांचे ॥ ४४ ॥ साधावया या कार्यासी। सामर्थ्य एक हनुमंतासी। इतरांची गति कायसी। लक्ष्मणासी वांचवावया ॥ ४५ ॥ इतुकें सांगोनि श्रीरामासी। सवेंचि सांगे हनुमंतासी। 'आजि सौमित्र वांचवावयासी। तूंचि' होसी प्राणदाता ॥ ४६ ॥

> एवमुक्त्वा महाप्राज्ञः सुषेणो राघवं वचः।
> समीपस्थमुवाचेदं हनूमंतं प्लवंगमम् ॥ ९ ॥
> सौम्य शीघ्रमितो गत्वा शैलं तं तु महोदयम्।
> पूर्वं वै कथितो योसौ वीरजाम्बवता तव ॥१०॥
> दक्षिणे शिखरे जातामोषधिं तामिहानय ॥ ११ ॥

**सुषेणाची हनुमंताला औषधि आणण्याची विनंतीः-**

जवळी बोलावोनी वायुनंदन। गुज सांगे सुषेण। लक्ष्मण पडिला विसंज्ञ[5]। त्यासी जीवदान त्वां द्यावें ॥ ४७ ॥ वांचविलिया लक्ष्मण। रामासीं सुखसमाधान। सुख सुग्रीवा अंगदा जाण। सुखसंपन्न वानर ॥ ४८ ॥ तूं श्रीरामाचा निजभक्त। तुज सबाह्य श्रीरघुनाथ। श्रीरामप्रेमें सदा डुल्लत। राम स्मरत सर्वदा ॥ ४९ ॥ तुज सर्वां भूतीं समसमान। अखंडता रामानुसंधान। दृश्य द्रष्टा आणि दर्शन। राम चिद्धन देखसी ॥ ५० ॥ सुग्रीव अंगद जांबवंत। नळनीळादि वानर समस्त। तुझेनि आम्ही रामभक्त। श्रीराम सेवित सर्वदा ॥ ५१ ॥ तुझेनि आम्हां श्रीरामभेटी। तुझेनि आम्हां श्रीरामीं गोष्टी। तुझेनि राम देखिला दृष्टीं। धन्य सृष्टीं तुझेनि आम्ही ॥५२॥ तुझेनि वानर वनचर। झाले श्रीरामसेवेचे किंकर। तुझेनि भवसमुद्र दुस्तर। झाला समग्र कोरडा ॥ ५३ ॥ जन्ममरणाचे आवर्ती[6]। बुडत होतों मारुती। ते तुवां लावोनि श्रीरामभक्ती। वानरपंक्ती उद्धरिल्या ॥ ५४ ॥ हेंचि नवल सांगों किती। तुवां उद्धरिली त्रिजगती। तुझेनि पापी उद्धरती। पापनिर्मुक्ती तुझेनि ॥ ५५ ॥ वानरमांदीसमवेत। पीडितां उपवासीं समस्त। तुवां नेवोनि विवरांत।

---

१ मरण. २ चैतन्यानें. ३ निस्तेज. ४ निश्चयाची. ५ बेशुद्ध. ६ भोंवऱ्यांत.

अळुमाळ = थोडे
विसंज्ञ = बेशुद्ध
अनुसंधान = लक्ष, चित्त

केले वृक्ष फळें जळें ॥ ५६ ॥ विवरेंसहित हेमा । तुवां उद्धरिली वीरोत्तमा । समुद्रतीरीं प्लवंगमा । मरणधर्मा चुकविलें ॥ ५७ ॥ पांखेंवीण मांसाचा गोळा । संपाती उद्धरिला कीं हेळा । शुद्धि लावोनि त्या काळा । समुद्रजळा आक्रमिलें ॥५८॥ छायाग्रह राक्षसी । तिणें सगळाचि गिळिलासी । काळीज उपटोनि वेगेंसीं । दुष्ट राक्षसी मारिली ॥ ५९ ॥ सुरसा दानवांची माता । न मारोनि गेलासी परता । पाय देवोनि पर्वतमाथां । तोही तत्वतां उद्धरिला ॥ ६० ॥ अति दुस्तर समुद्रतीरा । तुझा पराक्रम कपींद्रा । जावोनियां परतीरा । केलें चरित्रा तें ऐकें ॥ ६१ ॥ झाडा घेवोनी मध्यरात्रीं । लंका शोधिली मारुती । करोनि रावणसभा पालथी । सीता निश्चितीं शोधिली ॥ ६२ ॥ चौदा सहस्र वनचर । तुवां मारिले एकसर । झाडें झोडोनि समग्र । वन चौफेर विध्वंसिलें ॥ ६३ ॥ जंबुमाळी प्रधानपुत्र । तुवां मारिला अखयाकुमर । इंद्रजितासीं करोनि क्षात्र । रणीं सत्वर गांजिला ॥ ६४ ॥ देखोनि संमुख रावण । तुवां करोनि पुच्छासन । तिखट वाग्बाणीं करून । हृदयीं दशानन विंधिला ॥ ६५ ॥ आगी लावोनि पुच्छासीं । जाळिलें दाही मुखांसी । भस्म करोनि लंकेसी । सीताशुद्धीसी आणिलें ॥ ६६ ॥ एकल्या एकें आपण । अर्धरात्रीं तुवां जाण । आणोनि महापाषाण । सेतुबंधन संपविलें ॥ ६७ ॥ अति संकटींहि रिगम करून । खांदीं वाहून लक्ष्मण । वीर इंद्रजित दारुण । तुवां एकलेन मारविला ॥६८॥ मनीं न धरवती धरितां । तीं तीं कर्में केलीं हनुमंता । भक्तोत्तमा कपिनाथा । श्रीरामसुखार्थी बंधु उठवीं ॥ ६९ ॥ शीघ्र जावोनि आपण । उदया न येतां भास्वान । वेगीं दिव्यौषधींतें आणून । बंधु लक्ष्मण वांचवीं ॥ ७० ॥ पूर्वी वीरें जांबवंतें । तुजलागीं सांगितलें होतें । त्याचि जावोनि द्रोणाद्रीतें । दिव्यौषधींतें आणावें ॥ ७१ ॥ त्या पर्वताच्या दक्षिणशिखरीं । दिव्यौषधि थोरथोरी । एक त्यांच्या नामांची कुसरी । सविस्तरीं सांगेन ॥ ७२ ॥ शल्यें विशल्य होती पूर्ण । विशल्यकरणी तीस अभिधान । अति युक्तीनें आपण । वेगें शोधून आणावी ॥ ७३ ॥

विशल्यकरणी नाम सुवर्णकरणी शुभा ।
संजीवनार्थं वीरस्य लक्ष्मणस्य महात्मनः ॥ १२ ॥

औषधींचें गुणवर्णन :–स्वयें घाय जाती बुजोन । क्षतें कानपती आपण । अंगीं राहों न शके वण । सुवर्णा जाण तीस नांव ॥ ७४ ॥ पानें शीतळ सुकुमार । खुपों न शकती चंद्रकर । फळें हिरवीं सुंदर । रक्तांबर फुलें तिचीं ॥ ७५ ॥ वांचवावया लक्ष्मण । करावें सवेग गमन । म्हणोनि धरिले दोन्ही चरण । वेगीं प्रयाण करावें ॥ ७६ ॥ तूं आमुचा जीवदाता । तुवां चुकविली भवव्यथा । बहु बोलणें न घडे सर्वथा । सद्गुरु तत्वतां तूं आम्हां ॥ ७७ ॥ तुझेनि चुकलों भवभ्रमा । तुझेनि आम्हां श्रीरामीं प्रेमा । प्रिय व्हावया वानरां आम्हां । प्लवंगमा उठ वेगीं ॥ ७८ ॥ चित्तीं धरोनि रघुनंदन । करावें सवेग प्रयाण । तेणें सकळार्थ संपादून । विजयी होऊन येशील ॥ ७९ ॥ माझेनि स्वामी श्रीराम यांसी । माझेनि भक्तिसुख वानरांसी । ते मज सांगसी स्मरणासी । ऐसें मानसीं न मानावें ॥ ८० ॥ प्रेमाची जाति ऐसीच आहे । बोलतां मागें पुढें न पाहे । ऐसी कोणी एक स्थिती आहे । जाणता होयें तूं एक ॥ ८१ ॥ स्मरणीं नाहीं द्वंद्वबाधा । स्मरणें नाशे सकळापदा । छेदोनि द्वंद्वाचिया कंदा । परमानंदा पाविजे ॥ ८२ ॥ तें करोनि रामस्मरण । वेगीं करावें उड्डाण । मार्गीं जावें सावधान । मार्गचिन्ह जाणोनी ॥ ८३ ॥

---

१ सहज. २ युद्ध. ३ रिघाव, प्रवेश. ४ सूर्य. ५ बरी होतील. ६ सर्व विपत्ति.

समुद्रं समतिक्रम्य लवणोदं महोदधिम् ।
कुशद्वीपमतिक्रम्य क्षीरोदं च महार्णवम् ॥१३॥

औषधीचें ठिकाण, ती आणण्याची कालमर्यादा:—

लवणादि सकळ समुद्र । सांडून कुशद्वीप सुंदर । ओलांडोनि क्षीरसागर । पर्वतेंद्र आणावा ॥ ८४ ॥ पर्वताच्या उत्तरभागीं । दिव्यौषधि अनेगी । सर्वथा न लक्षिती जगीं । त्याही वेगीं परिसें पां ॥ ८५ ॥ अम्लानपुष्पें देदीप्यमान । प्रभा सूर्यतेजासमान । पर्णे सदा नित्य नूतन । समूळ जाण सुस्वादा ॥ ८६ ॥ समुद्रमथनीं अमृत । निघतां दैत्य भांडत । पर्वतीं सांडलें त्वरित । औषधि तेथ झालिया ॥ ८७ ॥ तेथें गंधर्व राज्य करिती । दुर्धर तयांची स्थिती । ओषधि अति यत्नें राखिती । अहोरात्रीं सावध ॥ ८८ ॥ तुज आणितां ओषधींसी । गंधर्व मिसळती युद्धासीं । चुकवोनियां अपायांसी । दिव्यौषधींसी आणावें ॥ ८९ ॥

बहुमायाश्च मार्गेषु राक्षसाः कामरूपिणः ।
अप्रमत्तेन गंतव्यं त्वया वीर महाबल ॥ १४ ॥
लक्षत्रयं योजनानां शतानां विंशतिर्दश ।
गंतव्यं धीयतां ध्याने द्विगुणं तु गतागतम् ॥१५॥
यावन्न क्षीयते रात्रिर्यावन्नोत्तिष्ठते रविः ।
तावत्त्वया महाबाहो आगंतव्यं महाबल ॥ १६ ॥
लक्ष्मणोऽपि विनश्येत नियतं शर्वरीक्षये ॥ १७॥

राक्षस नष्ट मायावी । कपटें छळिती महा-लाघवी । मार्गीं घालिती महागोंवी । ते चुकवावी अति यत्नें ॥ ९० ॥ नानापरींच्या छळणोक्ती । राक्षस छळिती अतर्क्ययुक्तीं । तें सांडून मारुती । शीघ्रगतीं परतावें ॥ ९१ ॥ दूरपंथ अति अध्वान । निमेषार्धेंसीं क्रमून । मनोवेगें तुज गमन । आम्ही संपूर्ण जाणतों ॥ ९२ ॥ तथापि मार्गाचिया गणिता । तुज सांगेन कपिनाथा । गमन करावया आतां । संख्या तत्वतां अवधारीं ॥ ९३ ॥ तीन लक्ष दहा शतें । दहा योजनें अधिक तेथें । येतां जातां द्विगुणितें । पंथ निश्चितें क्रमावा ॥ ९४ ॥ जंव रात्र आहे मध्यान्ह । सूर्योदय न होतां जाण । ओषधि घेवोनि संपूर्ण । शीघ्र आगमन करावें ॥ ९५ ॥ रात्रि अवघी अतिक्रमितां । सूर्य उदयातें न पावतां । ओषधि येती हाता । कपिनाथा अवधारीं ॥ ९६ ॥ उदया येतां दिवाकर । ओषधि मंदतेजा समग्र । होताती न लागतां क्षणमात्र । न होती गोचर सर्वार्थीं ॥ ९७ ॥ आणीक बीज एक कपिनाथा । तुज मी सांगेन तत्वतां । दिवाकर उदया येतां । कार्य सर्वथा नासेल ॥ ९८ ॥ ब्रह्मशक्तीसीं वरद पूर्ण । उदया येतां सहस्रकिरण । ज्यावरी घालिजे आपण । त्याचा प्राण वांचेना ॥ ९९ ॥ यालागीं कपिनाथा । सवेग गमन करीं आतां । सौमित्रा वांचवोनि सर्वथा । श्रीरघुनाथा सुख देईं ॥ १०० ॥

गच्छ वीर महाबाहो प्रार्थितं मंत्रयस्व नः ॥१८॥

राजा सुग्रीवाची हनुमंताला विनंती:—राजा सुग्रीव आपण । प्रार्थिता झाला वायुनंदन । शीघ्र करोनि प्रयाण । बंधु लक्ष्मण उठवावा ॥ १ ॥ बिभीषण लागे पायांसी । सत्वर करावें गमनासी । वेगें आणोनि औषधींसी । सौमित्रासी उठवावें ॥ २ ॥ वडील सकळ वानरांस । तो जांबवंत बोले सुरस । आणोनियां द्रोणाद्रीस । सुबंधूस वांचवीं ॥ ३ ॥ अंगद युवराजा जो कां । बोलोनियां अति नेटका । तोही विनवीतसे देखा । कपिनायका आदरें ॥ ४ ॥ तुझेनि सकळ दुस्तर । तरलों आम्ही वानर । तो तुझा उपकार । केवीं सांगूं समग्र हनुमंता ॥ ५ ॥ अति संकटीं दुर्गमीं । तुवां वांचविलों आम्ही । आम्हां सकळां तूंचि स्वामी । बहु वाचा मी किती बोलूं ॥ ६ ॥ आतां सकळार्थांचें सार । ऐकें कपींद्रा साचार । प्राण त्यागितां सौमित्र । सर्व संहार होईल ॥ ७ ॥ न देखतां

१ मोठा अडथळा. २ मार्ग. ३ हीनवीर्य.

महालाघवी = मोठे कपट

लक्ष्मण । राम तत्काळ सोडील प्राण । त्यासवेंचि सुग्रीव जाण । देईल प्राण तत्वतां ॥ ८ ॥ रामसुग्रीवांपाठीं । बिभीषण न राहे सृष्टीं । येरां वानरां काय गोष्टी । सकळ सृष्टीं आकांत ॥ ९ ॥ ऐकतांचि सीता सुंदर । न लागतां निमेषमात्र । सवेग त्यागील शरीर । अनर्थ थोर होईल ॥ ११० ॥ भरत शत्रुघ्न ऐकतां । प्राण सांडितील सर्वथा । ऐकतांचि तिघी माता । प्राण तत्वतां न राखिती ॥ ११ ॥ आकांत होईल अयोध्येसीं । आकांत सकळ लोकांसीं । आकांत देवदानवांसीं । सकळ सृष्टीसीं आकांत ॥ १२ ॥ बांधवडी सोडील कोण । वधील कोण रावण । देवकार्य न साधे पूर्ण । येवढें विघ्न मांडेल ॥ १३ ॥ यालागीं गा कपिनंदना । वीर शूर सर्वज्ञा । ओषधि आणोनि लक्ष्मणा । जीवदाना होईं दाता ॥ १४ ॥ इतकें बोलतां अंगद वीर । सकळ वानरांचा भार । ऐकोनियां श्रीरामचंद्र । काय उत्तर बोलत ॥ १५ ॥ कपिकुळपंचानना । ऐकें हनुमंता सर्वज्ञा । भ्रातृभिक्षेचिया दाना । यालागीं शरण जाण तुज आलों ॥ १६ ॥ लक्ष्मणाचें जीवदान । तुज भिक्षा मागों आलों जाण । सर्वथा पराङ्मुख न होणें । बंधुजीवदान मज देईं ॥ १७ ॥ वनीं एकला एक अनाथ । लक्ष्मणेंवीण जालों येथ । आम्हां जीवदाता कपिनाथ । तुवां सनाथ करावें ॥ १८ ॥ वांचलिया लक्ष्मण । आम्ही बंधु चौघे जण । पांचवा हनुमंत आपण । निश्चयें जाण भाक माझी ॥ १९ ॥ पांच मिळतां एके ठायीं । रणीं युद्धाचा पाड कायी । रावणाचें भय नाहीं । घायीं ठायीं निमेल ॥ १२० ॥ हेंचि नवल सांगूं कायें । पांचही एक जाले हो पाहें । साधों शके महत्कार्य । सहजान्वयें सांगेन ॥ २१ ॥ होतां पांचांचा एक मेळा । विरे पांचां भूतांचा गोळा । पांचां इंद्रियांचा पाळा । एकहेळां भस्म होय ॥ २२ ॥ हे पांचां विषयांची विषयस्थिती । एके निमेषार्धें भस्म होती । विषयीं शोभे चिच्छक्ती । जैं पांचही मिळती एकत्र ॥ २३ ॥ इतस्ततां विचरती जाण । ते सामर्थी येती पंचप्राण । चळण सांडोनि आपण । निश्चल जाण स्वयें होत ॥ २४ ॥ एकें आंवरिल्या चौघांस । होय पांचांची एक मूस । अहंकार चित्त बुद्धि मानस । सहज समरस स्वयें होती ॥ २५ ॥ पांचांचिया एकात्मता । कळिकाळातें हाणों लाता । कायसा काळ नियंता । ब्रह्मसायुज्यता होता चढे ॥ २६ ॥ जिणोनि जीवशिवपदवी । स्वस्वरूप स्वयें अनुभवी । पूर्णब्रह्मत्व ठसावे जीवीं । पंचऐक्यभावीं पद ऐसें ॥ २७ ॥ यालागीं गा कपिनंदना । शीघ्र करोनि प्रयाणा । वांचवीं बंधु लक्ष्मणा । बहु प्रतारणा काय बोलूं ॥ २८ ॥ ऐसें श्रीरामाचें उत्तर । तैसेंच जुत्पती समग्र । ऐकोनि आल्हादें कपींद्र । काय उत्तर बोलत ॥ २९ ॥ समुद्र ओलांडोनि आसकों । जेणें पाळथी केली लंका । भेदरा लाविला दशमुखा । तो हनुमान देखा सरसावला ॥ १३० ॥ हनुमान साटोपतां जीवीं । सुरदुंदुभी त्राहाटिल्या देवीं । पुष्पवृष्टि केली अवघी । निजवैभवीं कपींद्रा ॥ ३१ ॥ सत्वर जावोनि कपिपती । ओषधी आणील निश्चितीं । सौमित्र उठवील मारुती । उदया गभस्ती न येतां ॥ ३२ ॥ लक्ष्मण उठलिया जाण । श्रीराम स्वयें आपण । निमेषार्धें वधील रावण । राज्यीं बिभीषण स्थापील ॥ ३३ ॥ फिटेल सकळांची सांकडी । सुटेल देवांची बांधवडी । आणोनियां अमरकोडी । स्वर्गीं गुढी उभारिती ॥ ३४ ॥

**हनुमंताचें श्रीरामांना वंदन व आश्वासनः–**

ऐसा सरसावला वानर । करोनि रामनामें भुभुःकार । काय बोलिला उत्तर । श्रीरघुवीर परिसत ॥ ३५ ॥ लोटांगण श्रीरामचरणां । करून अनुवादला जाणा । सावध ऐकें रघुनंदना । विज्ञापना हे माझी ॥ ३६ ॥ स्वामीस येवढी कोण चिंता । दिव्यौषधी समर्था । मजसारिखा दूत

१ सरळ रीतीनें. २ इकडे तिकडे. ३ ऐक्यतेला. ४ सर्व.

सांकडी = संकट, अडचण
पाळा = समुदाय, चिच्छक्ती = परमात्मा, शुद्ध चैतन्य, बुद्धि, मन
विरे = विर्य, तेज, सामर्थ्य / एकहेळां = अकस्मात

असतां । क्षणार्धता आणीन ॥ ३७ ॥ ऐकें नरवीर-पंचानना । क्षणीं विकळ करिसी मना । तुझेनि नामें दीनजनां । आंगवण जाणा धैर्याची ॥ ३८ ॥ तुझेनि नामें यश कीर्ती । तुझेनि नामें धृति विरक्ती । तुझेनि नामें अगाध शांती । प्राणी पावती रघुराया ॥ ३९ ॥ नामीं नाहीं जन्ममरण । नामीं नाहीं निजपतन । नामीं सदा स्वानंदघन पूर्ण । नाम चिद्घन रघुवीरा ॥ १४० ॥ अत्यंत जड मूढ पाषाण । नामें उद्धरले संपूर्ण । तेथें बापुडें मरण कोण । श्रीलक्ष्मण जिताव्रया ॥ ४१ ॥ मुख्य ओषधी सकळ जनीं । नाम अमृतसंजीवनी । नामें-निर्मुक्त भवबंधनीं । चूडामणी नरवीरा ॥ ४२ ॥ कायसें ब्रह्मशस्त्राचें बळ । कायसें बापुडें काळ । मृत्यूचें मारक सबळ । नाम केवळ रघुनाथा ॥ ४३ ॥ ऐसें असोनियां स्वामी । मज आज्ञा दिधली तुम्हीं । तरी दिव्यौषधी आणीन मी । ज्या दुर्गम तिहीं लोकीं ॥ ४४ ॥ चिंता न करीं रघुनाथा । चित्ता दुःख नेदीं सर्वथा । चिंतेचे बाण हृदयीं घेतां । दुःखावस्था अनिवार ॥ ४५ ॥ चिंता संचरल्या शरीरीं । सुख नेदी तिळभरी । लागतां चिंतेची लहरी । सुरासुरीं कांपिजे ॥ ४६ ॥ सुख नेदी राजभवन । सुख नेदी भोगायतन । दारापुत्रादि जन । सुख जाण न देती ॥४७॥ सुख नेदी धनसंपत्ती । सुख नेदी सकळ संपत्ती । सुख नेदी यश कीर्ती । चिंता चित्तीं प्रवेशतां ॥४८॥ चिंतेनें नव्हे इहलोक । चिंतेनें प्राप्त नव्हे स्वर्गिक । चिंतेनें न साधे योगसुख । चिंतादाह देख भला नव्हे ॥ ४९ ॥ परमानंदाचें वन समग्र । चिंतेनें जाळिलें चौफेर । चिंतेनें परमार्थाचें घर । निरंतर उद्वसे ॥ १५० ॥ परमात्मा श्रीरामचंद्र । चिंतेनें केलासी किंकर । इतरांचा कायसा विचार । चिंता दुस्तर श्रीरामा ॥ ५१ ॥ ते चिंतेचा समूळ दाहो । कीरितें तुझें नाम पहाहो । एवढा तुझा नामनिर्वाहो । महाबाहो श्रीरामा ॥ ५२ ॥ ते समूळ चिंता सांडूनि पाहीं । स्वस्वरूपीं सावध होयीं । सौमित्रासी भय नाहीं । प्रतिज्ञा पाहीं हे माझी ॥ ५३ ॥ आतांचि जावोनि सत्वर । आणोनि ओषधिसंभार । क्षणें उठवीन सौमित्र । प्रतिज्ञा साचार हे माझी ॥५४॥ ऐसें बोलोनी गोळांगूळ । आहाटिलें भूमीसीं लांगूळ । पुढील कथा अति रसाळ । श्रोते सकळ परिसोत ॥ ५५ ॥ एका जनार्दनाचें तान्हें । भुकाळू परी मार्गों नेणें । यालागीं मजकारणें । मुखीं घांस देणें जननियें ॥ ५६ ॥ जें गोड लागे माउलीसीं । तोंडींचें काढी ते वेगेंसीं । ओपी बाळकाच्या मुखासीं । निजमानसीं स्नेहाळ ॥ ५७ ॥ एका जनार्दना शरण । श्रोतीं द्यावें अवधान । हनुमान जावोनी आपण । ओषधींसीं आगमन करील ॥१५८॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां ओषध्यर्थहनुमंत-प्रार्थनं नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥ ओंव्या ॥ १५८ ॥ श्लोक ॥ १८ ॥ एवं ॥ १७६ ॥

---

## अध्याय पंचेचाळिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### अप्सरेचा उद्धार

ऐसें बोलतां हनुमंत । संतोषला श्रीरघुनाथ । स्वानंदसुखें डुल्लत । पाठी थापटित कपींची ॥ १ ॥

राघवः पुनरेवेदमुवाच पवनात्मजम् ।
त्वरं वीर त्वयावश्यमानेतव्या महौषधि ॥ १ ॥
स्वस्ति तेऽस्तु महासत्व गच्छ यात्रां प्रसादतः ।
एवमुक्तस्तु रामेण सुग्रीवेणांगदेन च ॥ २ ॥
सुवेलमभिसंरुह्य संपीड्याप्लुत्य वानरः ।
जगाम सत्वरं श्रीमानुपर्युपरि सागरे ॥ ३ ॥

---

१ धैर्य. आंगवण = शक्ती

२ भयाण-ओसाड होतें. गोळांगूळ = श्रेष्ठ

श्रीरामांचा हनुमंताला आशीर्वाद व आज्ञाः- सर्वांचि बोले रघुराजा । सवेग उठीं पवनात्मजा । शीघ्र करोनि यावें काजा[1] । बंधुराजा उठवावें ॥ २ ॥ स्वस्थ असो तुझें चित्त । स्वस्थ असो जीवित । अंग प्रत्यंग समस्त । कपिनाथ निजविजयी ॥ ३ ॥ स्वस्ति असो तुजलागीं । कल्याण असो सर्वांगीं । सर्वदा विजयी जगीं । तनु सर्वांगीं सुदृढ ॥ ४ ॥ हनुमंता होईं चिरंजीवी । तेंही जीवित्व ज्ञानानुभवी ज्ञानविज्ञानपदवी । तुझेनि व्हावी जगासी ॥ ५ ॥ आतां मी तुज देवों आशीर्वाद । तंव पूर्वींच तुझें बळ अगाध । प्रताप कीर्ति अति प्रसिद्ध । ऐक सावध सांगेन ॥ ६ ॥ बाळपणीं आकळिला भानु । तंव वज्रें इंद्रें हाणितला हनु । हनुमंत हें नामाभिधानु । तेंपासून तुज जालें ॥ ७ ॥ त्या रवीच्या धांवण्यासीं । आले लोकपाळ वेगेंसीं । ख्याति लाविली तयांसी । ऐक सावकाशीं सांगेन ॥ ८ ॥ कुंठित जालें इंद्रवज्र । शिवाचा शूळ जाला चूर । वरुणाचे पाश समग्र । चकचूर पैं जाले ॥ ९ ॥ तुज न बाधी वरुणपाश । दुसरा आश्रमीं आश्रमपाश । तिसरा कर्माचा कर्मपाश । तुज वीरेशा बाधीना ॥ १० ॥ धर्मपाश ज्ञानपाश । अहंकाराचा अहंपाश । परब्रह्मींचा ब्रह्मपाश । तुज सहसा बाधीना ॥ ११ ॥ तेथें वरुणपाश ते किती । तुज बांधावया मारुती । यमाची तेथें कोण शक्ती । तुज निश्चितीं दंडावया ॥ १२ ॥ यम नियंता[2] सकळ जगा । पदाभिमानें लगबगा । दंड घेवोनियां वेगा । तुज सवेगा दंडूं आला ॥ १३ ॥ त्या यमाचा यमदंड पाहीं । मोडून गेला तुझे देहीं । इतर बापुडीं कोण कायी । हनुमान पाहीं दंडावया ॥ १४ ॥ अग्नि वायु कुबेर चंद्र । सर्वही झाले तुझे किंकर । एवढा अदटें[3] साचार । हनुमान वीर तिहीं लोकीं ॥ १५ ॥ आपुलियाहो प्रतापशक्तीं । लाहोनि[4] सकळांची वरदोक्ती । वज्रदेही ऐसी ख्याती । त्रिजगतीं मिरविजे ॥ १६ ॥ कायसें माझें वरदान । आतुर्बळी वायुनंदन । वेगें करोनि उड्डाण । बंधुरत्न मज देईं ॥ १७ ॥

हनुमंताचें उड्डाण व त्याचां परिणामः-ऐसें बोलतां श्रीरामचंद्र । सकळ वानरांचे भार । ऐकोनी पिंजारिला कपींद्र । अति भ्यासुर[5] भासत ॥ १८ ॥ पिंजारिल्या रोमावळी । दिसे विक्राळ दांताळी । मस्तक गेला नभोमंडळीं । गोळांगुळीं आवेश ॥ १९ ॥ दोन्ही दिसती नेत्रगोळ । जैसे धगधगीत इंगळ । त्राहाटितां भूमीसीं लांगूळ । लोक सकळ भयभीत ॥ २० ॥ वळिला पुच्छाचा आंकोडा[6] । लंघोनि सुबेळेचा कडा । राम स्मरोनि वेगाढा । केला गाढा भुभुःकार ॥ २१ ॥ ऐकोनि त्याचा भुभुःकार । दचके कैलासीं शंकर । ब्रह्मांड हडबडिलें थोर । घोरांदर मांडिलें ॥ २२ ॥ अकाळीं प्रळयो कायसा सृष्टीं । प्रळयरुद्र निमती दृष्टी । इंद्रादिक पडिले संकटीं । प्राण कंठीं दाटले ॥ २३ ॥ कडे खचले सागरीं । वृक्ष भ्रमती गगनांतरीं । उड्डाण करितां कपिकेसरी । सुरासुरीं आकांत ॥ २४ ॥ सप्त सागरां खळबळा । धरा जावूं पाहे रसातळा । आकांत जीवमात्रा सकळा । गोळांगुळाचेनि धाकें ॥ २५ ॥ करोनियां रामनामस्मरण । सवेग केलें उड्डाण । न लागतां अर्धक्षण । सागर संपूर्ण क्रमियेला ॥ २६ ॥ उपर्युपरी गगनांतरीं । सत्यलोकपर्यंत वरी । गेली उड्डाणाची थोरी । विक्रम भारी कपीचा ॥ २७ ॥ दिशा दुमदुमिल्या संपूर्ण । प्राणांतिक सकळ राक्षसगण । तें ऐकोनियां रावण । अति चिंता मन उपजवी ॥ २८ ॥ म्हणे गेलिया कपींद्र । आणील ओषधी समग्र । उठविल्या सौमित्र । श्रीरामचंद्र नाटोपे ॥ २९ ॥ हे तंव एकमेकांपरीस । वीर रणयोद्धे कर्कश । अवघे मिळाल्या युद्धास । मग आम्हांस प्राणांत ॥ ३० ॥ आतां काय करूं विचार । प्रधान मारिले समग्र । इंद्रजितादि अखया पुत्र । कुमरें कुमर मारिले ॥ ३१ ॥

१ काम. २ शासन कराणारा. ३ पराक्रमी. ४ संपादून. ५ निखारे. ६ शेंपूट.

विज्ञान = विशेष ज्ञान, तत्वज्ञान, पिंजारणे = केस अस्ताव्यस्त होणे

रावणाला चिंता व कालनेमि राक्षसाला विनंतीः–
ऐसें चिंतितां रावणा । करूं विसरला भोजना । विसरला उदकपाना । अति चिंता मना पीडित ॥ ३२ ॥ निद्रा न लागे शेजेसीं । करीत असे उठीबैसी । तंव देखिलें काळनेमीसी । मग चरणासी लागला ॥३३॥ चारी मुखें सरती लाळा । दाढा विकट विकराळा । धगधगीत नेत्रगोळा । जैसे इंगळ खदिराचे ॥ ३४ ॥ जिव्हा मुखीं समसमित । अति दीर्घ चारी हात । केश नीळ कठिण तेथ । उभे दिसत शूळ जैसे ॥ ३५ ॥ अति तिखट दाढा चारी । मुख समान पर्वतदरी । खापराऐसा काळा शरीरीं । मुखें चारी समसमित ॥ ३६ ॥ वृक्ष रोंविले जैसे असती । तैसे हात पाय दिसती । भिंगुळवाणी शरीराकृती । देखतां भीती यम काळ ॥ ३७ ॥ अति भयानक शरीर । त्या प्रार्थी दशशिर । तुवां जावोनि सत्वर । पर्वतेंद्र ठाकावा ॥ ३८ ॥ लवणादि सकळ समुद्र । कुशद्वीप समग्र । लंघोनियां क्षीरसमुद्र । पर्वतेंद्र ठाकावा ॥ ३९ ॥ तुज नभोवेगें गमन । म्हणोनि आलों तुज शरण । तेथें गेला कपिनंदन । त्यासीं विघ्न करावें ॥४० । काळनेमी ऐक विनंती । लक्ष्मणा भेदलीसे शक्ती । उदया येतां गभस्ती । सौमित्र निश्चितीं मरेल ॥ ४१ ॥ यालागीं वायुनंदन । करोनि सवेग उड्डाण । दिव्यौषधी आणोन । स्वयें लक्ष्मण उठवील ॥४२॥ उदया न येतां गभस्ती । आणोनि ओषधी समस्तीं । वांचवावया निश्चितीं । प्रतिज्ञा मारुति करून गेला ॥ ४३ ॥ तत्काळ ओषधी आणोन । आतांचि उठेल लक्ष्मण । मग त्यासीं झुंझेल कोण । रामलक्ष्मण आतुर्बळी ॥ ४४ ॥ अति बळिया हा वायुनंदन । कळिकाळा नाटोपे जाण । बलिष्ठ सकळ वानरगण । त्यांसीं कोण झुंझेल ॥ ४५॥ कपटेंकरून ब्रह्मशक्ती । आकळिलाहे ऊर्मिलापती । तंव कार्य साधावें हातोहातीं । उदया गभस्ती न येतां ॥ ४६ ॥ चंद्रामृतें सदा पूर्ण । चंद्राचल म्हणती म्हणोन । एरवीं तो द्रोणाद्री जाण । नामाभिधान विख्यात ॥ ४७ ॥ रूपा आलें चंद्रामृत । अमृतसंजीवनी त्यासी म्हणत । ओषधी ऐशा अनंत । पर्वतीं समस्त वर्तती ॥ ४८ ॥ तेथें गेला कपिनंदन । बहु माया करोनि आपण । त्यासीं करावें विघ्न । सूर्योदयो जंव न होय ॥ ४९ ॥ तेंही मायेचें लक्षण । जटाधारी वल्कलाभरण । सर्वांगीं भस्मोद्धूळण । असाधारण ऋषिवेष ॥ ५० ॥ तापसवेष धरोन पूर्ण । करावां आश्रम निर्माण । गोंवावया कपिनंदन । माया आपण करावी ॥ ५१ ॥ सुपक फळें सुशीतळ जळ । सुंदर वृक्ष सुपरिमळ । आपण धरावें अति सुशीळ । गोळांगूळ विगुंतवावया ॥ ५२ ॥ निष्ठा दावावी ब्रह्मज्ञान । कथेसीं वर्णावा रघुनंदन । तेणें त्यासीं सुख गहन । कपिनंदन विगुंतेल ॥ ५३ ॥ आतिथ्य करावें हनुमंता । सुरस सांगावी रामकथा । जेणें गुंती पडे कपिनाथा । तें तें सर्वथा करावें ॥५४॥ तेथें महाशूर राक्षसी । प्राणिमात्रा सगळें ग्रासी । आपण युक्ति साधावी ऐसी । जे कपींद्रासी ते गिळी ॥ ५५ ॥ ओषधी समीप सविस्तर । जळें संपूर्ण सरोवर । सुंदर कमळीं मनोहर । तेथें कपींद्र गोंवावा ॥ ५६ ॥

> तत्र त्वया प्रहंतव्य उपायेन प्लवंगमः ।
> हनूमति विनष्टे तु लक्ष्मणो न भविष्यति ॥ ४ ॥
> लक्ष्मणस्य विनाशेन रामो वै नभविष्यति ।
> रामस्य च विनाशेन सुग्रीवो नभविष्यति ॥५॥
> सुग्रीवस्य विनाशेन ह्यंगदो नभविष्यति ।
> अंगदस्य विनाशेन क्षयं यास्यंति वानराः ॥ ६ ॥
> ध्रुवमस्य जयो वीर गच्छ शीघ्रं महाबल ।
> अर्धराज्यं प्रदास्यामि कृते कर्मणि राक्षस ॥७॥

गमन करोनि शीघ्रगती । सर्व प्रकारें असे शक्ती । जेणें मरण पावे मारुती । ते ते युक्ती साधावी ॥ ५७ ॥ मी तुज सांगों कपटगती । तंव

---

१ भयानक. २ सूर्य.

भीमा. रा.....१३४

नीळ = एकवनस्पती जिच्यापासुन निळा रंग काढतात

तूं केवळ कपटमूर्ती । तेथें माझी काय युक्ती । सर्वथा मारुती मारावा ॥ ५८ ॥ मरण पावल्या हनुमंत । सौमित्र मरेल त्वरित । मरण पावेल रघुनाथ । दोघां मृत्य त्याचेनि ॥ ५९ ॥ मरण पावल्या रघुनंदन । कैसेनि वांचेल बिभीषण । सुग्रीवही सांडील प्राण । अर्ध क्षण न लागतां ॥ ६० ॥ नळ नीळ जांबवंत । जुत्पती मरतील समस्त । एवढा साधेल कार्यार्थ । जरी हनुमंत मारिला ॥ ६१ ॥ म्हणोनि धरिले दोनी चरण । देईन अर्ध राज्य जाण । चिंतासागरीं बुडतां पूर्ण । तारूं आपण स्वयें व्हावें ॥ ६२ ॥ मग ग्लानि भाकी बहुता । पडे चरणांवरी मागुता । मज होतसे प्राणांत अवस्था । जीवदाता तूं होईं ॥ ६३ ॥

**कालनेमीचें अनिच्छेनें प्रयाणः**—ऐसें ऐकतांचि उत्तर । दचकला राक्षसवीर । हृदयीं खोंचिला दुर्धर । कपटप्रकार भला नव्हे ॥ ६४ ॥ कपट करितां हिरण्यकशिपु । खंडविखंड केली वपु[1] । तेथें आमचा कोण प्रतापु । रुद्ररूप जिंकावया ॥ ६५ ॥ कपट साधिलें अमरेंद्रें[2] । भगीं व्यापिलें शरीरें । कपट साधिलें चंद्रें । क्षयरोगें थोर व्यापिला ॥ ६६ ॥ खाऊन जेवून घर घेणें । ऐसें मांडिलें सहस्रार्जुनें । सांडून हस्तपाद छेदणें । शेखीं प्राणें निमाला ॥ ६७ ॥ येणें रावणें जाण । सांडोनिया राजचिन्ह । भीक मागों गेला आपण । सीते कोरान्न[3] देयीं माते ॥ ६८ ॥ माता म्हणे जियेसी । भोगूं पाहे तियेसी । कपटें मेळविलें धुळीसी । सपुत्रसैन्येंसीं मारविलें ॥ ६९ ॥ इतरांची गति कायसी । कपटें नाडिलें देवांसी । ईश्वरत्व सांडोनि मानसीं । स्वयें भिकेसी लागला ॥ ७० ॥ आपण होवोनियां रंक । बळीसी मागों लागला भीक । तेणें द्वारपाळ केला देख । पुराणें असंख्य बोलती ॥ ७१ ॥ यालागीं कपटाची वार्ता । भली नव्हे गा सर्वथा । कपट करितां कपिनाथा । स्वघातासी करावें ॥ ७२ ॥ श्रीरामाचे निजभक्त । त्यांसीं कोणी कपट करित । ते स्वयेंचि मरण पावत । नरक भोगित अनिवार ॥ ७३ ॥ हनुमान श्रीरामाचा किंकर । श्रीरामभजनीं अति तत्पर । त्यांसीं कपट करी जो नर । त्याचें शरीर वांचेना ॥ ७४ ॥ ऐसें जाणतों मी आपण । स्वयें सांगतसें रावण । कपीसी जें विघ्नकरण । तें मजचि मरण ओढवलें ॥ ७५ ॥ पायां पडोनि रावणें । अर्ध राज्य देईन म्हणे । मज निमालिया प्राणें । राज्य कोणें भोगावें ॥ ७६ ॥ आतां न वचतां[4] राहों येथें । तरी रावणचि करील घात । तयापरिस हनुमंतें । होय आम्हांतें हित कांहीं ॥ ७७ ॥ हनुमान सबाह्य श्रीरघुनाथ । श्रीरामप्रेमें सदा डुल्लत । होतां त्याचेनि हातें घात । कृतकृतार्थ मी जालों ॥ ७८ ॥ ऐसें विचारोनि मनीं । मान देत रावणवचनीं । तुझी आज्ञा उल्लंघोनी । सामर्थ्य जनीं असेना ॥ ७९ ॥ ऐसा कोण आहे थोर । जो उल्लंघूं शके तुझें उत्तर । वेगें करोनि नमस्कार । निशाचर उसळला ॥ ८० ॥ पर्वता पावे जंव मारुती । तंव आपण गेला शीघ्रगती । माया केली अति निगुती । तेही निश्चितीं परिसावी ॥ ८१ ॥

एवमुक्तं तु तद्रक्षः प्रणिपत्य दशाननम् ।
मनोजवेन वेगेन संप्राप्तश्चंद्रपर्वतम् ॥ ८ ॥
तस्मिन्पर्वतपार्श्वे तु सोऽकार्षीन्माययाश्रमम् ।
अग्निहोत्रेण दिव्येन सोपवासकृशोदरः ॥ ९ ॥
जटामुकुटभारेण चीरवल्कलसंवृतः ।
दीर्घश्मश्रुधरो भूत्वा तस्थौ जपपरायणः ॥ १० ॥
गृह्याक्षमालां हस्तेन तस्यागमनकांक्षया ॥ ११ ॥

**कालनेमीची माया निर्मिती व हनुमंताची मार्गप्रतीक्षाः**—तेथें जावोनी रक्षोगण । केला आश्रम निर्माण । फळें जळें संपूर्ण । वृक्षारोपण अति रम्य ॥ ८२ ॥ आपण घेवोनि अग्निहोत्र । तापसवेषें निशाचर । दिसे उपवासी निरंतर । गेलें उदर खपाटीं ॥ ८३ ॥ माथां जटांचा संभार । परिधान त्यासी वल्कलांबर । वक्त्रीं वाढले श्मश्रु[5] फार । अति विचित्र

१ शरीर. २ इंद्र. ३ कोरडी भिक्षा. ४ न जातां. ५ मुखावर.

भासती ॥ ८४ ॥ काखबळ हात। लिंग बुडालें केशांआंत। वानप्रस्थरूप तेथ। जप करीत एकाग्र ॥ ८५ ॥ हातीं घेवोनि जपमाळी। बुबुळें नेलीं भंवयातळीं। जैसी खेचरी मुद्रा लाविली। तैसी शैली दिसताहे ॥ ८६ ॥ घालोनियां वज्रासन। करोनियां एकाग्रमन। बकवत् धरोनि ध्यान। पाहे आगमन कपीचें ॥ ८७ ॥ उदकामाजी असे बक। जैसा कोणी सात्त्विक। जळवासी पुण्यश्लोक। ऐसा देख दिसतसे ॥ ८८ ॥ मत्स्य आलिया दृष्टीतळीं। गटकावोनि सगळा गिळी। तेंवी राक्षस कपटमेळीं। कपिआगमन शैली पाहतसे ॥ ८९ ॥

हनुमंताचें आगमन व दिशाभूलः— तंव दक्षिणदिशेच्या भागीं। जैसी मूस ओतिली आगी। कीं नक्षत्रांचा पुंज स्वर्गीं। दिसे वेगीं धांवत ॥९०॥ कीं बाळसूर्य उदया आला। तैसा येतसे दादुला। नातरी शेषफणाहूनि निष्टला। मणि निघाला चरावया ॥ ९१ ॥ ऐसें उड्डाण कपिनाथा। आलें पर्वताचे माथां। देखतां आकांत राक्षसचित्ता। धीर सर्वथा न धरवे ॥ ९२ ॥ डोळां पडली झांपडी[१]। हातां वळली वेंगडी[२]। पडली मनाची मुरकुंडी। नावेक भंवंडी[३] त्यासी आली ॥ ९३ ॥ मग सावध होवोनि पाही। विचारोनि आपुलेच देहीं। म्हणे मज जालें कायी। आठव नाहीं कार्याची ॥ ९४ ॥ सकळ जन्माचें निजसार। मज जोडों आलें साचार। आणि मी दुश्चिंत पामर। स्वहितविचार नाठवे ॥ ९५ ॥ म्यां स्वामिकार्य साधावें येथें। कीं मुक्त व्हावें कपिहस्तें। तें विसरोनि निजकार्यातें। मूर्च्छितचित्तें पडिलों असें ॥ ९६ ॥ ऐसें विचारोनि मनीं। स्वस्थ बैसला आसनीं। कपीनें देखिला दुरोनी। मग धांवोनी तेथ आला ॥ ९७ ॥ दुरोनी देखिला तापस। हर्षित कपीचें मानस। भरला सर्वांगीं उल्लास। ऋषिनमनास तेथ आला ॥ ९८ ॥ हनुमान श्रीरामकिंकर। रामरूप चराचर। देखे सर्वदा साचार। प्रेमा थोर श्रीरामीं ॥९९॥ ज्यासी जैसी अंतर्वृत्ती। ते जगातें तैसेचि देखती। तेही विषयींची उपपत्ती। श्लोकसंपत्ती परिसावी ॥१००॥ सज्जनाचें मुख्य लक्षण। ब्रह्मस्वरूप स्वयें आपण। जग देखणें ब्रह्मपूर्ण। कपटचिन्ह तो नेणे ॥ १ ॥

नारायणमयं धीराः पश्यंति परमार्थिनः।
जगद्धनमयं लुब्धाः कामुकाः कामिनीमयम् ॥१२॥

जिणोनियां काम क्रोध। दमूनि इंद्रियांचें द्वंद्व। खणोनि विषयाचा कंद। परमानंद पावले ॥ २ ॥ त्यांसी दृश्य द्रष्टा दर्शन। ध्येय ध्याता आणि ध्यान। ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान। अवघें चिद्धन भासत ॥ ३ ॥ हें सज्जनाचें लक्षण। लुब्ध जे कां वित्तेषण[४]। सांगों त्यांचेंही चिन्ह। सावधान अवधारा ॥४॥ द्रव्यलाभ देखे ज्यापासीं। सदा ओळखे तयासी। अणुमात्र नुल्लंघी वचनासी। म्हणे सर्वस्वेंसीं मी दास तुझा ॥ ५ ॥ देखे धनवंत वेव्हारें। सौजन्य त्यासीं अत्यादरें। विरक्त देखोनि एकसरें। स्वयें दातारें बैसवी ॥ ६ ॥ म्हणे भगवंताची कोण सत्ता। सिद्ध ईश्वरदत्तभोग असतां। सांडून धरली तापसता। अभाग्यता केवढी पां ॥ ७ ॥ वित्तैषणाचा जो नर। त्याचा ऐसा विचार। आतां कामातुर जो नर। संक्षेपाकार सांगेन ॥ ८ ॥ स्त्रीकाम ज्यांचे चित्तीं। मायबहिणींतें नोळखती। स्त्रीरूप झाली वृत्ती। जग देखती स्त्रीरूप ॥ ९ ॥ बापां भावासीं सांगतां गोष्टी। मायबहिणींचा विकल्प पोटीं। इतरांची कायसी गोष्टी। सकळ सृष्टीमाझारी ॥ ११० ॥ हनुमान साधुरत्न अगाध। साधुरत्नें अद्वैतबोध। नेणे राक्षसाचें कपट भेद। साधुत्वें शुद्ध नमूं आला ॥ ११ ॥ दिव्याश्रम मनोरम। देखोनियां महोत्तम। नमन करितां प्लवंगम। अति सप्रेम हरिरंगें ॥ १२ ॥ येरु स्वकार्या अति कुशळ। आला देखोनि गोळांगुळ। घातलें लोटांगण प्रबळ। चरणकमळवंदना ॥ १३ ॥

---

१ पडदा[?]वर. २ भिरभिरी. ३ भोंवळ. ४ मूळ कारण. ५ धनलोभ करणारे.

मुरकुंडी = मनाचे संकोचन
मूस = सोने चांदि आटविण्याचे पात्र
झापडी = डोळे जड होणे / नावेक = क्षणभर

हनुमंताचें स्वागतः-बैसों घातलें वरासन । आणिलें चरणक्षाळणा जीवन । अर्घ्यपाद्यादि संपादन । पूजाविधान मांडिलें ॥१४॥ नम्र होवोनि अत्यंत । चरण चुरावया धांवत । आणिलीं फळमूळें समस्त । कपीसीं आतिथ्य मांडिलें ॥१५॥ स्वामी अंगीकारावें फळमूळ । प्राशन करावें शीतळ जळ । मार्गीं शिणलेती बहुळ । स्वेदकल्लोळ सर्वांगीं ॥ १६ ॥ दिसतोसी जैसा रामदूत । वानरतनुगृहीत । कोण कार्या त्वरित । तुम्हीं येथ येणें केलें ॥ १७ ॥ म्हणाल तूं काय जाणसी । मज भेटी झाली बहुत ऋषींसीं । त्यांहीं सांगितलें वार्तेसी । ऐक तुजपासीं सांगेन ॥ १८ ॥ रामलक्ष्मण बंधु दोघे । पितृवचनेंसीं निघती वेगें । क्रमोनियां मही स्वांगें । वना वेगें पैं आले ।१९। त्यांचा पुरुषार्थ अत्यद्भुत । परिसतां तो कपिनाथ । आवडी उठली बहुत । अनुच्चारित परिसावया ॥ १२० ॥ स्वयंवरीं भंगिलें हरकोदंड[२] । रावणाचें काळें तोंड । झाडिलें भार्गवाचें बळबंड । यश प्रचंड घेतलें ॥ २१ ॥ सीतेसमवेत दोघे जण । वना निघाले आपण । मारोनि राक्षस दारुण । वाळीही जाण मारिला ॥ २२ ॥ राज्य सुग्रीवा दीधलें । वानरसैन्य आपैसें केलें । तें वानरतनुज देखिलें । म्हणोनि पुसिलें उत्तर ॥ २३ ॥ स्वागत असो गा तुज । सनाथ करावें मज । जरी देखसी अधिकार ओज । जीवींचें गुज तुज सांगों ॥ २४ ॥

> स्वागतेनार्थयित्वा च सोऽब्रवीत्त्वं क चागतः ।
> विश्रमस्व कपिश्रेष्ठ भुक्त्वा पीत्वा च गम्यताम् १३
> तस्य तद्वचनं श्रुत्वा हनूमान्वाक्यमब्रवीत् ।
> श्रुता चेद्यपि किष्किंधा वानराणां महापुरी ॥१४॥
> सुग्रीवो यत्र वसति वानरेंद्रो महाबलः ।
> तस्य मित्रं महाराजो रामो दशरथात्मजः ॥१५॥
> तस्य भार्या जनस्थाने हृता सीतेति विश्रुता ।
> मायाविना राक्षसेन रावणेन दुरात्मना ॥ १६ ॥
> तन्निमित्तं च लंकायां युद्धमासीत्सुदारुणम् ।
> तस्य भ्राता राघवस्य लक्ष्मणो नाम वीर्यवान् १७
> शक्त्यासौ ताडितो, विप्र विसंज्ञो मेदिनीं गतः ।
> तस्यार्थमिह संप्राप्त ओषधिं प्रति तापस ॥ १८ ॥

रामचरित्र-श्रवणानें हनुमंताला विश्वास वाटला :— श्रीरामाची निजकथा । तापसमुखें ऐकतां । उल्हास झाला कपिनाथा । देखोनि सादरता वानरीं ॥२५॥ श्रीराम असतां जनस्थानीं । रावण कपटरूपें येवोनी । शून्याश्रम[३] देखोनी । श्रीरामपत्नी चोरिली ॥ २६ ॥ ते सीतेच्या धांवण्यासीं । श्रीराम निघे वेगेंसीं । मार्गीं आडवे होतां राक्षसांसी । श्रीरामें त्यांसी मारिलें ॥ २७ ॥ वाळीनें पीडून सुग्रीवासी । हरिलें स्त्री आणि राज्यासी । रामें मारोनि त्यासी । सुग्रीवासी स्थापिलें ॥ २८ ॥ सुग्रीवराजा महावीर । सकळ वानरांचे भार । झाले श्रीरामाचे किंकर । बद्धोपकार होउनी ॥ २९ ॥ दोघां पडिलें अति सख्य । समुद्रीं शिळा बांधिल्या देख । न लागतां निमिष एक । लंकासंमुख येते झाले ॥ १३० ॥ युद्ध झालें घोरांदर । रावणप्रधानादि कुमर । मारिलें सैन्य जुंझार । मारिले समग्र एक एक ॥ ३१ ॥ दुःखें खवळला रावण । घेवोनि ब्रह्मशक्ति आपण । हृदय सौमित्राचें लक्षून । शक्ति दारुण हाणितली ॥ ३२ ॥ शक्ति भेदून हृदयासीं । निघोनि गेली भूमीसीं । अति विकळता सौमित्रासीं । पडिला क्षितीं निचेष्टित ॥ ३४ ॥ वांचवावया सौमित्रासी । नेवों आलों ओषधींसी । सूर्य न ये पां उदयासीं । मज त्वरेसीं जाणें असे ॥ ३४ ॥ सांगितलें सकळ वृत्त । तूं तपस्तेजें अति विख्यात । जाणोनी माझे मनोगत । शीघ्र कार्यार्थ साधावा ॥ ३५ ॥ विलंब न करावा सर्वथा । ओषधी सांगाव्या समस्ता । भास्कर उदया न येतां । मज तत्त्वतां जाणें असे ॥ ३६ ॥

१ पाणी. २ शिवधनुष्य. ३ रिकामी पर्णकुटिका.

पानीयं पातुमिच्छामि शीघ्रं भावय तस्य मे ।
येन तृप्तिं गमिष्यामि तत्कुरुष्व महातप ॥ १९ ॥

तव दर्शनें मुनिवरा । सुखानुकोटी मज कपींद्रा । करूं पाहसी पाहुणेरा । निरोप सत्वरा मज द्यावा ॥ ३७ ॥ सेवितां सज्जनगृहींचें उदक । अंतर पुनीत होय देख । प्राप्त होय जरी अन्नादिक । ब्रह्म-सुख देख तो पावे ॥ ३८ ॥

याचयेच्छ्रोत्रियस्यान्नं तदभावे पिबेज्जलम् ॥२०॥

सज्जनाचे घरचें अन्न । घ्यावें बळेंचि मागोन । नाहीं तरी आपण । जीवन तरी मागावें ॥ ३९ ॥ आलियाही ब्रह्मादिक । सज्जनान्न न पवती देख । हें घडलें गा प्रत्यक्ष । गोपाळ सकळ काला करिती ॥ १४० ॥ म्हणोनि घ्यावें फळमूळांसी । तरी मी आलों रामकार्यासी । न जातां स्वामिकार्य सिद्धीसीं सर्वथा आहारासी न सेवूं ॥ ४१ ॥ सांडून स्वामिकार्यार्था । जो पुढें घालील उदरचिंता । तो महापापी तत्त्वतां । अधःपाता जाय वेगीं ॥ ४२ ॥ यालागीं स्वामिकार्य न होतां पूर्ण । न करीं फळ-मूळभोजन । तुझिया आदरालागीं जाण । उदक-पान करीन ॥ ४३ ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा रक्षो वचनमब्रवीत् ।
श्रूयतां वचनं सत्यं त्वया मे वानराधिप ॥ २१ ॥
इदं महत्सरो दिव्यं पानीयं पातुमर्हसि ॥ २२ ॥

हनुमंताला सरोवराकांठीं पाण्यासाठीं पाठविलें:—

ऐकोनि कपीच्या वचनासी । राक्षस सुखावला मानसीं । अनोयासें पावेल मृत्यूसी । सरोवर-उदकासी प्राशितां ॥ ४४ ॥ ऐसा निश्चय मानूनि पूर्ण । बोले कपीसी वचन । स्वामिकार्य न होतां जाण । आग्रह आपण करूं नये ॥ ४५ ॥ आश्रमा-समीप सरोवर । अत्यंत पवित्र तेथींचें नीर । पान करितां अल्पमात्र । ओषधी समग्र देखसी ॥४६ ॥ हनुमान अत्यंत विश्वासी । कपट सर्वथा नाहीं मानसीं । मानिलें त्याचिया वचनासी । निजमानसीं कपिनाथें ॥ ४७ ॥ साधुवचनीं विकल्प करी । तो नर महादुराचारी । यश न पावे तो संसारीं । चराचरीं अति निंद्य ॥ ४८ ॥ ऐसा निश्चय करोनि पूर्ण । मानोनि ऋषीचें वचन । मग दृष्टीं सरोवर लक्षून । उदकपान करूं आला ॥ ४९ ॥

पिबतस्तस्य पानीयं पद्मपत्रपुटेन तु ।
उदकाभ्यंतरे ग्राही पादं जग्राह दक्षिणम् ॥२३॥
ततस्तां स महाबाहुर्हनुमान्मारुतात्मजः ।
जले नयंतीं दृष्ट्वा तु नखैस्तीक्ष्णैर्व्यदारयत् ।२४।
निहता तत्क्षणे दिव्या आकाशेधिष्ठिताब्रवीत् २५

हनुमंताच्या लत्ताप्रहारानें मगरीचा वधः—

उदकपान हनुमंत । करावया उदकाआंत । रिघ-तांचि पाहीं तेथ । पायीं त्वरित धरियेला ॥१५०॥ ब्रह्मशापें सबळ ग्राही । हनुमान धरिला दक्षिण पायीं । येरू निधडा वीर पाहीं । भय नाहीं कोणाचें ॥ ५१ ॥ स्वभावें निधडा वीर । त्यावरी श्री-रामाचा किंकर । दमूं शके काळचक्र । ग्रह किंकर काय त्यापुढें ॥ ५२ ॥ करोनि श्रीरामनामें भुभुः-कार । पाय आंसुडितां सत्वर । कडे पडली वेग-वत्तर । दिव्य शरीर लाधली ॥ ५३ ॥ कपटें करोनि सर्वथा । श्रीरामभक्ताचे पाय धरितां । कळिकाळातें हाणोनि लाता । शापनिर्मुक्तता सत्संगें ॥ ५४ ॥ दंडकसुत उद्धत झाला । शापें राक्षसत्व पावला । तो अंगदथापा[३] हाणितला । तत्काळ केला निर्मुक्त ॥ ५५ ॥ दक्षशाप नारदासी । दोन मुहूर्त स्थिर न राहसी । तो द्वारके राहे वर्षानुवर्षी । सत्संगासीं शाप न बाधे ॥ ५६ ॥ जळचर ग्राही शापदग्ध । लागतां हनुमंताचें पद । नखाग्रें झाली शुद्ध । सुख अगाध संतचरणीं ॥५७॥ लागतां कपीचें नखाग्र । सांडिलें शापजन्य शरीर । लाहोनि अवयव सुंदर । गगना सत्वर उसळली ॥ ५८ ॥ अंतरिक्ष गगनांतरीं । राहूनि बोलत सुंदरी । विजयी होईं कपिकेसरी । निरंतरीं रामप्रेमें ॥ ५९ ॥

१ अंतःकरण. २ प्यात्यावर.

३ अंगदाच्या मुष्टिप्रहारें करून.

दक्षिण पाय = उजवा पाय
मुहुर्त = ४८ मि.
घटी = २४ मि.

मां विजानीह्यप्सरसं विद्युन्मालेति विश्रुताम् ।
गच्छंत्याकाशमार्गेण स्वर्भानोर्दीप्तविग्रहा ॥२६॥
इह मे वसतिर्भद्र वर्षाणामयुतं शतम् ।
उक्ता च तेन ऋषिणा दीप्तक्रोधेन मानद ॥२७॥
अवज्ञातो मया शक्रस्तेनाहं पतिता भुवि ।
गच्छ ग्राही भवस्वेति शप्ताहं तेन वानर ॥२८॥
यदा वीरं हनूमंतं गृहीष्यसि जलेचरा ।
तदा शापाद्विमोक्षस्ते भविष्यति न संशयः॥२९॥
दिष्ट्या त्वमिह संप्राप्तः शापाच्चैव विमोक्षिता ३०

अप्सरेचें शापमुक्तिकथन व हनुमंताचें अभिनंदनः

कर जोडोनियां वंदन । करोनी विनवी हनुमान । मी विद्युन्मालिनी अप्सरा जाण । स्वर्गभूषण स्वर्गीचें ॥ १६० ॥ सूर्यप्रभेसम विमान । करोनी विचरतां गगन । भास्करें क्षोभोनियां जाण । ऋषिआश्रमीं विमान पाडिलें ॥ ६१ ॥ तेणें क्षोभले मुनीश्वर । क्रोधा चढले दुर्धर । न विचारिसी पात्रापात्र । कामाचार विचरसी ॥ ६२ ॥ महाग्राह जैसा कोणी । येवोनि झोंबे दाटुनी । तैसी आलीसी धांवोनी । आश्रम लक्षोनी पापिणी ॥ ६३ ॥ ग्राहाऐसी धांवसी । ते तूं महाग्राही होसी । ऐसें शापिलें वेगेंसी । तेणें ग्राहत्वासी पावलें ॥ ६४ ॥ त्यांसी होवोनि शरणागत । म्यां प्रार्थिले ते महंत । रवीसीं म्यां केलें उद्धत । दंड तदर्थ मज झाला ॥ ६५ ॥ साधूसीं जो करी छळण । अथवा करी उद्धतपण । किंवा करी जो हेळण । तत्काळ पतन तो पावे ॥ ६६ ॥ नव्हती पुराणींच्या कथा । मोझा अनुभव प्रत्यक्ष आतां । जे उपेक्षिती साधुसंतां । त्यांसीं खस्ता रोकडी ॥ ६७ ॥ ऐसें विनवितां ऋषिजन । तिंहीं होवोनी प्रसन्न । मज दिधलें वरदान । तुझें उद्धरण हनुमंतें ॥ ६८ ॥ तूं राहोनि जळवासी । धरिसी कपीच्या पायांसी । स्पर्श होतां सज्जनासीं । तेणें उद्धरसी सत्संगें ॥ ६९ ॥

न ह्यम्मयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयाः ।
ते पुनंत्युरुकालेन दर्शनादेव साधवः ॥ ३१ ॥

सत्संगास्तव पाहीं । संसार तरती ते देही । इतर शाप बापुडे कायी । मुक्त होइजे सत्संगें ॥ १७० ॥ तैंपासून मी येथ । वर्षे अयुत अयुत । होतें मी तुझी वाट पाहत । झालें निर्मुक्त तुझेनि आजि ॥ ७१ ॥ जन्ममरणावस्था । मज नाहीं गा सर्वथा । म्हणोनि कळिकाळा हाणोनि लाता । स्वरूपता पावलें ॥ ७२ ॥ आपुले निजसुख पाहीं । निरोपावें सद्‌गुरुपायीं । तें मी लाधलें सर्वही । झालें उतराई भवश्रमा ॥ ७३ ॥ सद्‌गुरूची स्थिती ऐसी । स्वयें अनुभवणें ज्या सुखासी । तेंचि पावे शिष्यासीं । न्यूनाधिकासी न करोनि ॥ ७४ ॥ पित्याचें समस्त वित्त । पुत्र स्वामित्वें अंगीकारित । तैसें सद्‌गुरुसुख समस्त । शिष्य आक्रमित भावार्थे ॥ ७५ ॥ अजातपक्ष्याची जाति पाहीं । नेणे माउलीवांचून कांहीं । मुख पसरोनी सर्वही । ग्रास अवघाही झेलित ॥ ७६ ॥ तेही तैसेंचि प्रेमें तेणें । विसरोनि आपुलें खाणें । सगळा घांस बाळका देणें । बाळकाकारणें अवंचक ॥ ७७ ॥ तूंचि माझा ईश्वरू । तूंचि माझा सद्‌गुरू । मज दीना उद्धार । केला साचार तुवां एकें ॥ ७८ ॥ संसारसागरीं बुडतां । सद्‌गुरुवांचूनि तत्त्वतां । आन नाहीं सोडविता । सत्य वार्ता हे माझी ॥ ७९ ॥ तुवां एकलेनि एकें । उद्धरलीं ब्रह्मांडें अनेकें । तेथें मजसारिखीं रंकें । कोणे लेखें लेखावीं ॥ १८० ॥ भवसागरीं तारक । जगीं तूं एकला एक । तुजवांचूनि आणिक । न दिसे देख त्रिजगतीं ॥ ८१ ॥ एका जनार्दनाचे रंकें । अंध पंगु दीन मुकें । देखोनियां एकाएकें । सत्वर देख आलिंगी ॥ ८२ ॥ नाम एक रूप एक । वर्णाश्रमधर्म एक । जगीं जनार्दन एक । नाम तारक त्रिजगतीं ॥ ८३ ॥ एका जनार्दना शरण । करोनि अप्सरा स्तवन । सांगों पाहे पुढील चिन्ह । सावधान

---

१ दुःख. २ पंख फुटले नाहींत अशा पक्ष्याची. ३ दुसरा.

अयुत = दहा हजार

परिसावें ॥८४॥ सज्जनांचा स्वभाव पूर्ण । दीनदयाळु चातकघन । अनाथासी देखतां जाण । घेती धांवोन उचलोनि ॥८५॥ गोड लागे निजमानसीं । तें वंचोनि स्वगोत्रासी । नेदोनि स्त्रीपुत्रासी । अनाथासी अर्पित ॥८६॥ यापरी मी अनाथ । भवदरिद्रें होतों पीडित । एका जनार्दनीं येथ । केला सनाथ त्रिजगतीं ॥८७॥ जालें अप्सराउद्धरण । पुढें काळनेमीचें मर्दन । एका जनार्दना शरण । गोड निरूपण उरलें असे ॥१८८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अप्सराउद्धरणं नाम पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥४५॥ ओंव्या ॥१८८॥ श्लोक ॥ ३१ ॥ एवं ॥ २१९ ॥

## अध्याय शेहेचाळिसावा

॥ श्रीरामसद्गुरवे नमः ॥

### हनुमंताचें नंदिग्रामाला प्रयाण

अप्सरेनें हनुमंताला राक्षसी मायेची कल्पना दिली:—उद्धरोनियां ते खेचरी[1] । विजयी झाला कपिकेसरी । येरी राहोनि गगनांतरीं । मधुर स्वरीं अनुवादे ॥ १ ॥ तुझिया उपकारा हनुमंता । काय म्यां उतरायी व्हावें आतां । कांहीं विनवीत तत्वतां । सावधानता परिसावें ॥ २ ॥ तूं अदट दादुगा वीर होसी । कळिकाळातें दृष्टी नाणिसी । त्याहीवरी रामस्मरणेंसीं । अहर्निशीं डुल्लत ॥ ३ ॥ रामनामस्मरणापुढें । विघ्न कायसें बापुडें । आश्चर्य देखिलें वाडेंकोडें । तुजपुढें सांगेन ॥ ४ ॥ तूं भावार्थी श्रीरामभक्त । नेणसी कपटाची मात । निष्कपट तूं कपिनाथ । राम देखत सर्वत्र ॥ ५ ॥ विनवीत असें मी तुजप्रती । सावध ऐकें कपिपती । केवळ कपटाची कपटमूर्ती । तो हा राक्षस चित्तीं मानावा ॥६॥

> भृशं प्रीतास्मि ते वीर राघवाज्ञां प्रकुर्वतः ।
> पापात्मा एष दुर्बुद्धिर्येन त्वं मन्यसे कपिम् ॥१॥
> जहि रक्षो महामायं विप्रवेषं महाबलम् ।
> एष राक्षसराजेन रावणेन दुरात्मना ॥ २ ॥
> प्रेषितस्त्वद्विनाशाय कालनेमिर्निशाचरः ।
> इत्युक्त्वा वायुपुत्राय साप्सरा कामरूपिणी ॥ ३ ॥
> अंतर्धानं गता तत्र दृश्यमाना हनूमता ॥ ४ ॥

तूं रामाचा निजभक्त । स्वामिकार्यालागीं उद्युक्त । अति संकटीं दूर पंथ । क्रमोनि येथ आलासी ॥७॥ ज्यासी म्हणती परम साधु । तो हा कपटी महामैंदु । जाण राक्षस दुर्बुद्धु । तुज छळवाद करूं आला ॥ ८ ॥ रावणाचा परम आप्त । प्रतिज्ञा करोनियां येथ । ठाकून आला द्रोणपर्वत । छळणार्थ तुजलागीं ॥ ९ ॥ हा काळनेमी राक्षस । ब्राह्मणरूपें तापस । धरोनी आला तापसवेष । अति दुर्धर्ष महापापी ॥१०॥ झणें याचा विश्वास धरिसी । छळण करील क्षणार्धेसीं । छळछद्में याची मिरासी । बहु मायेसीं जाण तूं ॥ ११ ॥ जंव उदया ये सुभानु । तंव गोंवावा कपिनंदनु । कां मारावा सिंतरूनु । ऐसा पण करोनि आला ॥ १२ ॥ सत्य मानीं माझें वचन । वधीं महापापी दुर्जन । न मारितां करील विघ्न । सत्य जाण कपिनाथा ॥१३॥ ऐसें बोलोनि सुंदरी । गेली अंतरिक्ष गगनांतरीं । चाकाटला तो अंतरीं । कपिकेसरी अति विस्मित ॥ १४ ॥ गेली असतां स्वर्गांगना । आश्चर्य वर्तलें कपिनंदना । विचार आदरिला निजमना । दुष्टहननालागोनी ॥ १५॥ सबाह्य स्मरोनी रघुनाथा । राक्षस दुष्ट अवलोकितां । समूळ उडाली कपटता । श्रीरामदूताचेनि भेणें ॥१६॥ देखणा होवोनियां देहीं । पाहणें पाहतां ठायीं । दृश्यादृश्यत्वाचि नाहीं । द्रष्टा तोही हारपे ॥ १७ ॥ द्रष्टा हर-

१ आकाशसंचारी अप्सरा. २ कदाचित्.

सिंतरूनु = ठकून
अदट = धिट, पराक्रमी, अजिंक्य
दादुगा = दांडगा, मोठा
वाडेंकोडें = कौतुकाने

पलिया पाहीं । दर्शन नुरेचि कांहीं । भावनेसीं ठाव नाहीं । वेगळें कांहीं दिसेना ॥१८॥ द्रष्टा होय परिच्छिन्न । तरी भासे दृश्याचें भान । झालिया त्रिपुटीसीं बोळवण । कपटाचिन्हें तेथें कैंचें ॥ १९ ॥ एका श्रीरामनामासाठीं । उडती कपटाचिया कोटी । तो श्रीराम कपिसेनिष्ठीं । कपटगोष्टी तेथें कैंची ॥ २० ॥ निर्धारोनि पाहे तो कपींद्र । दिसे राक्षस भ्यासुर । महापापी दुराचार । यासी सत्वर मारीन ॥ २१ ॥ तेणें साधून पुरुषार्थ । करूं आला माझा घात । अति बळी रामदूत । याचा निःपात करीन ॥२२॥ ऐसें बोलोनि कपींद्र । आला राक्षसासमोर । बोल बोलोनि निष्ठुर । स्वयें वानर सरसावला ॥ २३ ॥ अरे पापिया निशाचरा । झणीं पळसी दुराचारा । तुझिया करीन मी संहारा । कपटाचारा सांडीं परतें ॥ २४ ॥ ऋषिरूप धरोनि तापस । करूं आलासी छळणास । आतां होईं सावकाश । करीं युद्धास निजबळें ॥ २५॥ माझेनि हातें त्वरित । आजि न वांचसी जीवें जीत । ऐसें जाणोनि निश्चित । करीं पुरुषार्थ निजबळें ॥ २६ ॥ ऐसें बोलतां मारुती । सरसावला राक्षसमूर्ती । रणीं जिंकावया कपीप्रती । साटोप चित्तीं मांडिला ॥२७॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा कालनेमिर्निशाचरः ।
रूपं विकुरुते घोरं दशकल्पप्रमाणतः ॥ ५ ॥
ऊर्ध्वं तु योजनं पंच धुन्वन्रूक्षशिरोरुहान् ।
अष्टौ दंष्ट्राः सुतीक्ष्णाग्राः सृक्किणीरपि संलिहन् ६
विवृते नयने घोरे मेघस्तनितनिःस्वनः ।
अर्धदग्धमलाते च प्रगृह्याभ्यपतद्धरिम् ॥ ७ ॥

मायावी राक्षसाच्या वधानें गंधर्वांची झोपमोड व क्रोधः-ऐकोनि कपीचें उत्तर । काळनेमि निशाचर । धरीत विक्राळ शरीर । अति भ्यासुर भासत ॥ २८ ॥ दश योजनें वाढला उंच । आडवा योजनें पांच । माथांचे उभारले कच[2] । जैसे वृक्ष शूळप्राय ॥ २९ ॥ आठही दाढा समसमित । मांसाचे चाकळे[3] आंत । चघळी अशुद्धें[4] निथळत । कैसा भासत भ्यासुर ॥ ३० ॥ भोंवयांतळीं बुबुळें खोल । जैसे धगधगीत इंगळ । तैसे दिसती नेत्रगोळ । अति विक्राळ आकृती ॥ ३१ ॥ जैसा मेघ गडगडिला । तैसा निशाचर गर्जिन्नला । कोलीत घेवोनि धांविन्नला । हनुमान दृष्टी लक्षूनी ॥ ३२ ॥ प्रताप देखोनि निशाचरीं । वेगीं वाढला कपिकेसरी । दहा योजनें गगनांतरीं । उसळोनि दूरी चालिला ॥ ३३ ॥ जैसा तापला लोहगोळ । तैसा परतला गोळांगूळ । सवेग चालिला सबळ । जैसा कल्लोळ अग्नीचा ॥ ३४ ॥ लक्षोनियां निशाचर । उडी घातली सत्वर । झालें शतचूर्ण शरीर । कपिभार वरी पडतां ॥ ३५ ॥ तरी राक्षस आतुर्बळी । आक्रंदें दिधली आरोळी । कपि तुझी युद्धसमेळीं । मी रांगोळी करीन ॥३६॥ ऐसें बोलतां राक्षस । भूमीं आदळला कर्कश । निधा उठिला बहुवस । पर्वतेश दणाणिला ॥ ३७॥ शब्द झाला अत्यद्भुत । गंधर्व होते निद्रिस्थ । ते उठोनियां तेथ । सैरा[5] धांवत पर्वतीं ॥ ३८ ॥ दणका उठिला दुर्धर । जागे झाले सत्वर । घेवोनियां शस्त्रास्त्र । पर्वतेंद्र शोधिती ॥ ३९ ॥

तं निहत्य महानादं ननाद च महाकपिः ।
तेन नादेन गंधर्वाः प्रबुद्धाः शैलवासिनः ॥ ८ ॥

तंव देखिला कपिकेसरी । भंवता वेढिला समग्रीं । वर्षताती शस्त्रास्त्रीं । निशीमाजी चोरी कैंवी करिसी ॥ ४० ॥ तूं कोण कैंचा कोण आहेसी । मध्यरात्रीं कां आलासी । पर्वतीं सैरा विचरसी । आज्ञा कोणासी पूसिली ॥ ४१ ॥ निशि मध्यान्ह-अंधारीं । तूं विचरसि गिरिशिखरीं । पर्वताकार-शरीरी । कोण धरेवरी पाडिला असे ॥ ४२ ॥ एक म्हणती पुसतां काय । धरा बांधा हात पाय । मध्यरात्रीं विचरत आहे । तस्कार होय सर्वथा ॥ ४३ ॥ ऐसा करिती कल्लोळ । मिनले सभोंवते

---

१ वानराच्या अंतःकरणपूर्वक भक्तींत. २ केश. ३ गोळे. ४ रक्त. ५ सैरावैरा.

कोलित = जळते लाकूड
निधा = प्रतिध्वनी
योजन = ७२ किलोमिटर
योजन = ४ कोस
कोस = २ मैल
मैल = १.६ किलोमिटर

सकळ । तें देखोनि गोळांगूळ । मधुर बोल बोलत ॥ ४४ ॥

गंधर्वाणां वचः श्रुत्वा हनूमान्वाक्यमब्रवीत् ।
श्रुता वा यदि किष्किंधा जंबुद्वीपसमाश्रया ॥९॥
वानराधिपतिस्तत्र सुग्रीवो नाम विश्रुतः ।
मित्रकार्यार्थमुद्युक्तो रावणेनाद्य विग्रहे ॥ १० ॥
मित्रभ्राता राक्षसेन शक्त्या च विनिपातितः ।
तदर्थे संप्रयातोहमोषधीः प्रार्थयाम्यहम् ॥ ११ ॥
विशल्यकरणीं नाम ज्ञात्वेह परमौषधिम् ।
विघ्नं नैव प्रकर्तव्यं प्रसादं कतुर्मर्हथ ॥ १२ ॥
अहं वानरराजस्य भृत्यस्तु परमैर्गुणैः ।
हनूमानिति विख्यातः स्वाम्यर्थे प्रार्थयाम्यहम् १३

हनुमंतानें गंधर्वांशा ओळख सांगितली व क्रोधाचें निवारण केलें:—जंबुद्वीपाचे दक्षिणकोनीं । किष्किंधा असे राजधानी । सुग्रीव राजचूडामणी । तये स्थानीं नांदत ॥ ४५ ॥ त्यासी सख्य श्रीरामेंसीं । स्वामी मानी श्रीरामासी । तन मन अर्पिलें भक्तीसीं । वानरांसीं अति प्रेम ॥४६॥ रामरावणांचें रण । युद्ध झालें अति दारुण । रावणें ब्रह्मशक्ति सोडून । बंधु लक्ष्मण[1] पाडिला ॥४७॥ वांचवावया सौमित्रासी । नेऊं आलों ओषधींसी । विघ्न न करावें आम्हांसी । नमन तुम्हांसी मी करितों ॥ ४८ ॥ उदया येतां गभस्ती । प्राण सांडील ऊर्मिलापती । म्हणोनि ओषधी मध्यरात्रीं । नेवों निश्चितीं मीं आलों ॥ ४९ ॥ सुग्रीवेंसहित वानर । सकळ श्रीरामाचे किंकर । माझें नाम हनुमान वीर । मार्ग सत्वर मज द्यावा ॥ ५० ॥ स्वामिकार्य साधितां पूर्ण । सर्वथा करूं नये विघ्न । पुढिलांसि करितां छळण । श्रीरघुनंदन क्षोभेल ॥ ५१ ॥

हनूमद्वचनं श्रुत्वा गंधर्वास्ते महाबलाः ।
विचित्रवसनाः सर्वे नानाप्रहरणोद्यताः ॥ १४ ॥

ऐसें बोलतां कपिकेसरी । गंधर्व सरसावले भारी । केवढी रामसुग्रीवांची थोरी । ओषधि रात्रीं नेवों आला ॥ ५२ ॥ सकळ सैन्य सरसावलें । मारावया सिद्ध झालें । गदा परिघ तिखट भाले । वर्षों लागले समकाळें[2] ॥ ५३ ॥ चौपासीं धांवती सैरा । होत गंधर्वां आडदरा । आकळावया वानरा । करिती खरा पुरुषार्थ ॥ ५४ ॥ गंधर्व मिनले चौदा सहस्र । एकला एक कपींद्र । क्रोधा चढला दुर्धर । करूं संहार आदरिला ॥ ५५ ॥ रूपें वाढला दारुण । रोमें थरकती संपूर्ण । भयानक दिसे चिन्ह । कपींद्र जाण खवळला ॥ ५६ ॥ एक मुष्टिघातें मारिले । एक दांतांतळीं रगडिले । उरले ते पुच्छीं बांधिले । मग आपटिले खडकेंशीं ॥ ५७ ॥ एकचि वेळे सत्वर । मारिले चौदा सहस्र । केला रामनामें भुभुःकार । विजयी कपींद्र स्वयें झाला ॥ ५८ ॥ ज्याचे मुखीं नामस्मरण । विघ्न त्याचे वंदी चरण । कळिकाळ स्वयें आपण । नित्य नमन त्यासी करी ॥ ५९ ॥ ऐसा नामधारक वीर । विजयी झाला कपींद्र । नामें गर्जोनि सत्वर । ओषधिभार पाहतसे ॥ ६० ॥

हत्वा गंधर्ववीराणां सहस्राणि चतुर्दश ।
पर्यटन्स गिरिं सर्वं नापश्यत महौषधिम् ॥१५॥
चिंतयामास हनुमान्कृते कर्मणि निष्फले ।
संगृह्य परिगच्छेयमुपहासो भविष्यति ॥ १६ ॥
सर्वं च पर्वतं दृष्ट्वा प्रयासे माविलंबत ।
तत्र ज्ञास्यति वैद्योऽसौ सुषेणः परमौषधिम् ॥१७॥

पर्वताचा औषधींसंबंधीं असहकार:— पर्वताचें शिखराशिखर । पाहतां ओषधिभार । सहसा नव्हती गोचर । तेणें कपींद्र खवळला ॥ ६१ ॥ चाळे मांडिले पर्वतें । दिसों नेदी ओषधींतें । नेणे माझ्या पराक्रमातें । सामर्थ्य याचें पाहूं पां ॥६२॥ म्हणोनि खवळला मानसीं । तंव ओषधी देखिल्या[3]

[1] लक्ष्मण. [2] एकाच वेळीं.

[3] पळापळ.



चौपासी = चोहीकडे

पश्चिमेसीं। धांवोनि गेला त्यांपासीं। तंव पूर्वेसीं देखिल्या ॥ ६३ ॥ उत्तर दक्षिण समस्त। अवघा पर्वत लखलखीत। वानर विस्मित जाला तेथ। काय येथ करावें ॥ ६४ ॥ ओषधी म्हणोनि धरूं जाय। तंव झाडोरा[१] कैंचा काय। तो सांडोनि आणखी पाहे। तंव तेथेंही होय तैसेंचि ॥ ६५ ॥ ऐसा झाला खेदक्षीण। नव्हेचि ओषधींचें दर्शन। चिंतातुर अति उद्विग्न। काय आपण बोलत ॥ ६६ ॥ आजि जितुका पुरुषार्थ केला। तितुका अवघा वायां गेला। कपटी राक्षस भेटला। तोही मारिला वायांचि ॥ ६७ ॥ दुष्कर कर्मं केलीं। तीं अवघींच वायां गेलीं। ओषधींनीं बुडी दिधली। शक्ति झाली तेही वृथा ॥ ६८ ॥ सुग्रीवा काय मुख दाखवूं। श्रीरामचरण कैसे पाहूं। अंगदा काय उत्तर देऊं। श्रीरघुराव क्षोभेल ॥ ६९ ॥ (मीं निजाभिमान केला पाहीं। ओषधी आणीन अवघ्याही। श्रीराम न साहे हें कांहीं अहंता सर्वही घातक ॥ ७० ॥ अहंता कर्म सिद्धी न वचे। अहंता सुख न घडे स्वर्गीचें। अहंता सार न पावे वेदांचें। अहंता साच घातक ॥ ७१ ॥ अहंता न साधे स्वामिकार्य। अहंतेनें साधन हत होय। अहंता यश न लाहे। निंद्य होय अहंता ॥ ७२ ॥ अहंता नव्हे चित्तशुद्धी। अहंता नव्हे साधनसिद्धी। अहंता नव्हे सत्वशुद्धी। अहंता त्रिशुद्धी घातक ॥ ७३ ॥ ऐहिक सुख नव्हे देख। अथवा नव्हे पारत्रिक। अहंता भोगिजे नरक। अहंता घातक जगा झाली ॥ ७४ ॥ ते अहंता मी आपण। श्रीरामा संमुख केली जाण। तेणें नागवलों संपूर्ण। ओषधिदर्शन नव्हे मज ॥ ७५ ॥) म्हणती हनुमान पामर। नेणे ओषधिसंभार। किती आणिलें कतवार। पालेखाइर[२] मर्कट ॥ ७६ ॥ काय विचार करूं आतां। उपडोनी वनस्पति समस्ता। भारा बांधोनियां नेतां। उपहासता होईल ॥ ७७ ॥ धांव पाव गा श्रीरामा। माझा अपराध करीं क्षमा। पडिलों संकटीं दुर्गमा। सर्वोत्तमा पाव वेगीं ॥ ७८ ॥ मी तुझें निजबाळक। ज्ञानमूढ अति उत्संक। क्षमा करोनि सकळिक। कृपा आवश्यक करीं मज ॥ ७९ ॥ ऐसी उत्कट चिंता। करितां तया कपिनाथा। श्रीराम आठवला चित्ता। बुद्धिदाता निजभक्तां ॥ ८० ॥ जो कायावाचामनेंसीं। शरण रिघे श्रीरामासीं। क्षणार्धे सोडवी त्यासी। राम भक्तासीं कृपाळु ॥ ८१ ॥ (बुद्धीची बुद्धि आपण। अंतरात्मा रघुनंदन। तेणें होवोनि प्रसन्न। कपिनंदन प्रबोधिला ॥ ८२ ॥)

> ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते।
> तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ॥ १८ ॥

पर्वताचें उच्चाटण करून आकाशमार्गें उड्डाणः—

गजेंद्र ग्राहें धरिला असतां। संकटीं स्मरला भगवंता। काकुलती उडी सत्वरतां। घालोनि तत्वतां उद्धरिला ॥ ८३ ॥ हनुमान अखंड नामधारक। नामें पावला रघुकुळटिळक। कपीस बुद्धि स्फुरली चोख। सत्वर देख सरसावला ॥ ८४ ॥ म्हणे एवढी कायसी चिंता। मी भ्रांत कां झालों आतां। सगळा पर्वताचि तत्वतां। नेऊं सर्वथा उचलोनी ॥ ८५ ॥ सुषेण वैद्यराज तेथें। ओळखील ओषधींतें। उठवील सौमित्रातें। अर्ध क्षण न लागतां ॥ ८६ ॥ जरी विलंब करूं येथ। उदया येईल भास्वत। शक्ति वरद अद्भुत। कार्य समस्त नासेल ॥ ८७ ॥ पर्वतें मांडिलें सळ। पाहों आदरिलें माझें बळ। ओषधी लपविल्या सकळ। मज केवळ गोंवावया ॥ ८८ ॥ हाही मिनला रावणासी। गोवूं आदरिलें आम्हांसी। उपडोनि याच्या कंदासी। ओषधींसी नेईन ॥ ८९ ॥ ऐसा करोनि विचार। केला रामनामें भुभुःकार[३]। कांपिन्नले सुरासुर। चराचर भयभीत ॥ ९० ॥

१ केरकचरा. २ खोडकर.

३ भुसरीनें.

हल८ – नाश झालेला

इति संचिंत्य बलवान्नानारत्नोपशोभितम् ।
सिंहव्याघ्रगजाकीर्णमुज्जहार महागिरिम् ॥१९॥

पुच्छें गुंडाळिलें बुडखातें । शिखर कवळिलें हातें । आंदोलितां पर्वतातें । भूतें आकांतें कलकलती ॥ ९१॥ करोनियां रामस्मरण । वेगीं उपडितां गिरि द्रोण । दणाणिलें त्रिभुवन । शेषफण तडकला ॥ ९२ ॥ दणाणिलें पाताळ । हडबडिले लोकपाळ । वनदेवतां खळबळ । केला कोल्हाळ सकळिकीं ॥९३॥ भेणें पळालीं वनचरें । तिहीं लंघिलीं गिरिकंदरें । ससे म्हैसे तरस तगरें । चौंफेरें कळकळिती ॥९४॥ अट्टहास्य मदगजांचे । आरड ते व्याघ्रांचे । सिंहनाद सिंहांचे । तेणें दचके यमलोक ॥ ९५ ॥ आंदोळल्या द्रुमवल्ली । भूतें आकांतलीं सकळीं । त्यांहीं दांतीं तृणें धरलीं । शरण आलीं कपीसी ॥ ९६ ॥ दिशा लंघिल्या पक्षिकुळीं । सर्प रिघाले पाताळीं । दिग्गजां बैसली टाळी । दातखिळी कृतांता ॥ ९७ ॥ दश योजनें विस्तार । पंच योजनें उंची थोर । ऐसा पर्वत सविस्तर । कपींद्रें सत्वर उपडिला ॥ ९८ ॥

दशयोजनविस्तीर्णं पंचयोजनमायतम् ।
दोर्भ्यां संगृह्य तं शैलमुत्पपात विहायसा ॥२०॥

पर्वतासह हनुमंताच्या उड्डाणामुळें विचित्र परिस्थितिः—बळें आकळोनि पाहीं । पर्वत उपडिला दोहीं बाहीं । गगना उसळला लवलाहीं । श्रम नाहीं अणुमात्र ॥ ९९ ॥ छत्राक[1] झेली बाळक । गज शुंडादंडें कमळ देख । तैसा चालिला कपिनायक । गिरि अलोलिक उपडोनी ॥ १०० ॥ तळीं अंधार पडे गडद । वरी प्रकाश अगाध । हेमच्छाया अति शुद्ध । कोंदलें नभ उजेडें ॥ १ ॥ तळीं अंधार प्रकाश माथां । नभीं सवेग उडत जातां । अयोध्येचा प्रदेश पावतां । भरतें तत्त्वतां देखिला ॥ २ ॥ अति विस्मित झाला मनीं । निविड दाटली असतां रजनी । काय जात आहे गगनीं । लक्षितां चिन्हीं लक्षेना ॥ ३ ॥ इंद्र बैसला बिमानीं । सर्वे अप्सरा घेउनी । क्रीडा करिताहे गगनीं । लाज मनीं असेना ॥ ४ ॥

भरताचा गैरसमज :—अंगत्राणें वात सुटला । तेणें ओषधिनाद उठिला । ध्वनि विचित्र उमटला । तो ऐकिला भरतानें ॥ ५ ॥ म्हणे केवढा हा उद्धत । वाद्यें लावोनि अद्भुत । अप्सरांसह विमानांत । सैरा विचरत आकाशीं ॥ ६ ॥ स्वयें घेवोनि वाराङ्गना । विमान हिंडवी गगना । उल्लंघोनी साधुसज्जनां । करी अटण उन्मत्त ॥ ७ ॥ जो स्त्रीसवें निरत झाला । मद्यप्राशनीं मातला । जो धनलोभें भुलला । त्याचा गेला विवेक ॥ ८ ॥ वेश्यागमनीं जे रत । ते सर्वदा अतिउन्मत्त । नाठवे स्वार्थ परमार्थ । स्वेच्छा विचरत खर जैसा ॥ ९ ॥ खर नेणे मर्यादा । दिवसा देखतां जनपदा । वेश्याद्वारीं विचरे सदा । न सरे कदा माघारा ॥ ११० ॥ लाता हाणितां उरावरी । प्रीतीं धांवे संमुख खरी । पदाभिघात मुखावरी । आवडीं करीं झेलित ॥ ११ ॥ तैसा पुरुष कामाचारी । सुखचि मानी निरंतरी । पाऊल जाऊं नेदी दुरी । हृदयावरी झेलित ॥ १२ ॥ म्हणे जन्मांतरींचीं फळलीं भाग्यें । इचें पादकमळ हृदयीं लागे । दैवें दंडिलीं अभाग्यें । वृथा वैराग्यें कष्टती ॥ १३ ॥ स्त्रीकामाची ऐसी रीती । ऐक मद्यप्याची स्थिती । वेंचून पदरची संपत्ती । स्वयें होती जगनिंद्य ॥ १४ ॥ जेणें द्रव्यें ऐहिक भोग जोडे । सकाम कर्में स्वर्ग आतुडे । निष्कामें तरी डोळ्यांपुढें । तिष्ठे रोकडें मोक्षसुख ॥ १५ ॥ वेंचूनियां ऐसें धन । करिताती मद्यपान । ते निजात्मघाती संपूर्ण । नरकसेवन आकल्प ॥ १६ ॥ धनलोभीं जे लुब्धक । स्वप्नीं न देखती सुख । जन्मादारभ्य[3] देख । भोगिती नरक अनिवार ॥ १७ ॥ मरणांत झटें घेतां । रुका न मिळे सर्वथा । तथापि सायास

---

१ यमाला. २ छत्री.

३ जन्मापासून.

अटण = भ्रमण, हिंडणे
निरूत = आसक्त
वारांगना = वेश्या

करितां। आळस चित्ता उपजेना ॥ १८ ॥ ऐसें ऐशा कष्टें मिळे। तें वाढवी उपायबळें। निजशरीर कष्टविलें। जेणें फळे निजमोक्ष ॥ १९ ॥ जेणें भोगिजे इहभोग। जेणें भोगिजे स्वर्गभोग। जेणें साधे महायोग। जीवशिवविभाग जेथ लाहे ॥ १२० ॥ एवढिये प्राप्तीचे दाते। ते कष्टती धनार्जनातें। इतरांसी कोण पुसे तेथें। दुःखी समस्तें संगतीचीं ॥ २१ ॥ देव धर्म नेणती कांहीं। पर्वकाळ ठाउका नाहीं। श्राद्धाची संभावना नाहीं। निराश पाहीं सदा पितर ॥ २२ ॥ जैं धनाचा वेंच होय। तैं प्राणचि जाऊं पाहे। सणावाराची नेणे सोय। अतिथि येथें काय करील ॥ २३ ॥ कष्टें जोडिली संपत्ती। ते ठेविती अति निगुतीं[१]। तोंडीं दगड माती घालिती। आपण मरती धुळी खात ॥ २४ ॥ ऐसी एक एकाची जाती। अधःपाता स्वयें नेती। तिन्ही एकत्र जेथें मिळती। तें दुःख किती सांगावें ॥ २५ ॥ ऐसा स्त्रीमदें मातला। विमानीं विचरत एकला। सज्जनांचा उलंघू केला। उन्मत्त छायेला पाडितसे ॥ २६ ॥ आम्ही सूर्यवंशी राजे नियामक। आम्हां स्वधर्म हाचि देख। उद्धतासीं लावणें सीक[२]। विचार आणीक असेना ॥ २७ ॥

◇ भरताच्या रामनामांकित बाणाचा हनुमंतावर आघातः—म्हणोनि रामनामांकित बाण। धगधगीत अति दारुण। चापीं साजिला आपण। दुष्टदळण करावया ॥ २८ ॥ करोनि रामनामस्मरण। धनुष्यीं ओढी काढून। बाणासी आज्ञा करून। दुष्टदळण करावें ॥ २९ ॥ बाण श्रीनामांकित। हनुमान श्रीरामभक्त। जीवापरिस अत्यंत आप्त। राम स्मरत सर्वदा ॥ १३० ॥ सुटोनि शितींच्या कडकडाटीं। बाण पडिला अति संकटीं। कोणावरी करावी शरवृष्टी। अभक्त दृष्टी दिसेना ॥ ३१ ॥ परतोनि जावें जरी येथून। भरत दंडील संपूर्ण। कपीसीं करावें कंदन। तरी यासीं स्मरण श्रीरामाचें ॥ ३२ ॥ भरत श्रीरामाचा निजभक्त। कपि सप्रेम राम स्मरत। माझा न चले पुरुषार्थ। बाण विस्मित विचारी ॥ ३३ ॥ भरताची आज्ञा ऐसी। जे दंडावें अति दुष्टासी। दुष्ट म्हणों न ये कपीसी। रामस्मरणेंसीं झुल्लत ॥ ३४ ॥ स्वामीच्या आज्ञेचें उल्लंघन न घडे। साधुअवज्ञा शिरीं न चढे। ऐसें विचारोनि वाडेंकोडें। चरणांकडे चालिला ॥ ३५ ॥ धरिलिया सज्जनांचे पाय। अपजय कधींच न होय। स्वामिकार्य सिद्धीस जाय। विजयी होय त्रैलोक्यीं ॥ ३६ ॥

रामनामांकित बाणामुळें हनुमंताला चिंताः—ऐसा निश्चय करोनि पूर्ण। पायीं मिठी घाली बाण। स्वयें विस्मित कपिनंदन। बाण कोण कोणाच ॥ ३७ ॥ ऐसें विचारिता मनीं। बाण अवलोकित नयनीं। देखतां श्रीरामनामांकित चिन्हीं। वायुनंदना अति विस्मयो ॥ ३८ ॥ श्रीरामाचा बाण होय। अतिक्रम याचा करूं नये। साष्टांगें नमन करिता होये। रामस्नेहें भावार्थे ॥ ३९ ॥ कपि कांक्षी बाणाचें वचन। तंव तो बोलेना संपूर्ण। पाहूं आदरिलें त्याचें चिन्ह। तंव तळीं बाण ओढित ॥ १४० ॥ उदया येईल दिवाकर। म्हणोनि सौमित्रासी रघुवीर। घेवोनि आला मजसमोर। बाण सत्वर तेथें ओढी ॥ ४१ ॥ कीं उठवोनि सौमित्र। वधोनियां दशशिर। करोनि बिभीषण राज्यधर। स्वयें सत्वर येथें आला ॥ ४२ ॥ मी नपुंसक सर्वथा। न पवेंचि स्वामिकार्यार्था। धिक् माझें जीवित्व वृथा। कोण अर्था जात असें ॥ ४३ ॥ ऐसा झाला अति दुःखी। सर्वेचि बाणातें अवलोकी। तंव तो ओढी अधोमुखीं। एकाएकीं सत्वर ॥ ४४ ॥ कार्य न साधेच माझेन। वेगें करीन देहपतन। म्हणोनि कृपाळु रघुनंदन। सत्वर बाण पाठविला ॥ ४५ ॥ आतां असो कांहीं भलतें। आज्ञा करणें निश्चितें। स्वयें अनुसरला बाणातें। विलंब येथें नये करूं ॥ ४६ ॥

---

१ धन मिळविण्यासाठी. कांक्षी = इच्छा २ शिक्षा., निगुती = सावधानता
अपजय = पराजय
अतिक्रम = उल्लंघन, अपमान

हनुमंताचें बाणाच्या मागोमाग जाणें:–हनुमान आज्ञेचा किंकर । आज्ञा नुलंघी अणुमात्र । टाकिलें बाणावरी शरीर । निघाला सत्वर बाणवेगें ॥ ४७ ॥ पातला अयोध्येचा आराम । पुढें देखिला नंदिग्राम । रचना अति मनोरम । भक्तोत्तम भरत जेथें ॥ ४८ ॥ एका जनार्दना शरण । दोघांची भेटी अति गहन । दोघे प्रेमळ संपूर्ण । दोघे दोनीपण विसरती ॥ ४९ ॥ एका जनार्दन कृपाळु जननी । गोड न खाय बाळावांचूनी । मुखींचा घांस काढोनी । माझ्या वदनीं घालित ॥ १५० ॥ जें अत्यंत खावों नेणे । त्याचे मुखीं घांस देणें । न खातां पायांवरी बळें पाडणें । घांस कोंदणें मुखामाजी ॥ ५१ ॥ वांझेसी हें न कळे चिन्ह । व्याली जाणे वेदन । कृपाळु एका जनार्दन । जिये अभिधान विश्वमाता ॥ ५२ ॥ ब्रह्मादिक पुत्र व्याली । जियें ब्रह्मांडें सृजिलीं । निजकर्में तृणें मानिलीं । मज ते चाली लक्षेना ॥ ५३ ॥ तान्हेल्या उदक द्यावें । कीं भुकेल्या जेऊं घालावें । मज हें सर्वथा न संभवे । तेणें ओल्हावे माउली ॥ ५४ ॥ यासीं काय करूं आतां । जन्मोनि झाला अकर्ता । किती याची करूं चिंता । कांहीं सर्वथा जाणेना ॥ ५५ ॥ घांस तोही घेवों नेणे । म्हणवूनि निज-मुखींचें काढणें । माझ्या मुखीं कोंदणें । बाळा-कारणें कृपाळु ॥ ५६ ॥ अति सुरस रामकथा । माउलीसी घांस-गोड घेतां । आड मी आलों अव-चितां । कांहीं सर्वथा जाणेना ॥ ५७ ॥ तेही कृपाळु कैसी । तोंडींचें काढोनि वेगेंसीं । ओपितां माझिये मुखासीं । निजमानसीं सुखावे ॥ ५८ ॥ बाळकाच्या धणीं धाइजे । कां शिष्याचेनि झालेपणें होइजे । आणिका हें न कळे सहजें । सद्गुरूनें जाणिजे कीं प्रसवतिया ॥ ५९ ॥ एका जनार्दना शरण । कपि रामाज्ञा धरून । बाणें आणिला आपण । गोड कथन पुढें असे ॥ १६० ॥ श्रोते कोपती झणें । सैराट भरला रानें । ओढिला एका जनार्दनें । कांहीं मनें स्मरेना ॥ १६१ ॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमंतनंदि-ग्रामगमनं नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥ ओंव्या ॥ १६१ ॥ श्लोक ॥ २० ॥ एवं ॥ १८१ ॥

## अध्याय सत्तेचाळिसावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### भरत-हनुमान भेट

भरताची राममय स्थितिः– हनुमान अत्यंत विश्वासी । अनुसरोनि बाणासीं । आला नंदिग्रामासीं । जेथें भरतासीं निवास ॥ १ ॥ भरत श्रीरामाचा निजभक्त । भरतें भक्ति उल्हासित । आचार्य भक्तीचा भरत । भरतें निर्मुक्त चराचर ॥ २ ॥ भरतें भक्ति विस्तारली । भरतें भक्ति प्रकाशिली । भरतें भक्ति वाढविली । भरतें पाल्हाळिली निजभक्ती ॥ ३ ॥ भरत भक्तीचा निजठेवा । भरत भक्तीचा विसावा । भरत भक्तीचा ओलावा । भक्तीच्या गांवा रिगम भरता ॥ ४ ॥ भरतें सत्य सद्भावो । भरतें साचार अनुभवो । भरतें प्रकट रामरावो । सर्वत्र पहा हो सर्वांसी ॥ ५ ॥ भरतें आपंगिली भक्ती । भरतें वाढविली विरक्ती । भरतें पाहिली निजशांती । भूतें भोगिती स्वानंद ॥ ६ ॥ मलयाद्रीच्या ठायीं । चंद-नाची पैं झाडी पाहीं । तेणें डोंगर सर्वही । केला लवलाहीं चंदन ॥ ७ ॥ नाहीं आपण तेथें गेला । नाहीं उपडोनि आणिला । अंगवात वरूनि गेला । तेणें गिरि केला चंदन ॥ ८ ॥ एक वनस्पतीचा बडिवार । चंदन केला डोंगर । बहकतसे चौफेर । सुवास थोर आवरेना ॥ ९ ॥ माझ्याचि हृदयीं

१ घालणें. २ नांव. ३ तृप्त व्हावें. ४ कदाचित्. ५ रक्षित. ६ पसरतो.

भगवंत। तो भगवंत मूर्तिमंत। तेणें काय नव्हे प्राप्त। सभाग्य संत त्रिजगतीं ॥ १० ॥

चित्ते मुकुंदो वदने मुकुंदो
दृष्टौ मुकुंदः श्रवणे मुकुंदः।
एवं सदा सर्वगतो मुकुंद-
स्ते मानवाः किं न मुकुंदतुल्याः ॥ १ ॥

दृष्टीं विषय समस्त। रामरूपें देखत भरत। दृश्य दृष्टा दर्शन तेथ। सहज होत रामरूप ॥११॥ श्रवणीं शब्द पडतांचि जाण। शब्दार्थ श्रीराम आपण। श्राव्य श्रावक श्रवण। स्वयें चिद्घन होवोनि ठाके ॥ १२ ॥ घ्राणें घेतां वास। वासा सबाह्य परेश। घ्रेयं[1] घ्राता घ्राण समस्त। चिदाकाश होवोनि ठाके ॥ १३ ॥ त्वचा घेवों जाय स्पर्शासी। तंव दोहींतें राम प्रकाशी। त्वचा स्पर्श स्पर्शनासी। सहज समरसी श्रीराम ॥ १४ ॥ रसना रातली आवडीं। घेतां रामरसाची गोडी। त्रिपुटी झाली देशोधडी। रसना ओसंडी रसातें ॥१५॥ कर्मेंद्रियें याचि रीतीं। सेवितां श्रीराम चिच्छक्ती। उडाली कर्मांची कर्मगती। स्वेच्छा वर्तती निष्काम ॥ १६ ॥ ऐसा भरत रामें कोंदला। तो देशचि राम झाला। हनुमान अत्यंत सुखावला। देखों लागला अपूर्व ॥ १७ ॥ नगरा बाह्य आराम। वृक्षध्वनीं रामराम। रामरूप सकळ द्रुम। प्लवंगम विस्मित ॥ १८ ॥ दिशा दुमदुमिती रामें। तृणें कोंदलीं रामनामें। वायु गर्जे रामनामें। व्योम रामें कोंदलें ॥ १९ ॥ सत्संगें धरा सधर। भूतें वागविते निरंतर। सांडून कठिनत्व प्रकार। मृदु अरुवार[2] स्वयें झाली ॥ २० ॥ सत्संगती ओलावली। अति शांति धरेसीं आली। एकात्मता विस्तारली। वर्तों लागली अविरुद्ध ॥२१॥ सत्संगती झाली जीवना। विसरोनि अधोगमना। ऐक्यवृत्ति सकळ जनां। अति स्वादन मधुरत्वें ॥ २२ ॥ गाय देखोनि सज्जन। निववी देवोनि जीवन। व्याघ्र पापी म्हणोन। उपेक्षण न करीचि ॥ २३ ॥ तेजासी होतां सत्संगती। आकर्षून दाहक शक्ती। स्वयें प्रकाश सर्वभूतीं। त्रिजगतीमाजी विचरे ॥ २४ ॥ ज्यानें प्रकाशिलें निजगृहीं। त्यासीं प्रकाश उणें नाहीं। पारखा[3] चोरूं आल्या पाहीं। प्रकाश त्यासही तैसाचि ॥ २५ ॥ वायु सत्संगा लाधला। चंचलत्व आपुलें विसरला। योगीश्वरा भेटों आला। निश्चळ झाला निजरूपीं ॥ २६ ॥ विचरे तरी सर्व देहीं। परी आसक्त नव्हे कांहीं। सुवास दुर्वास न म्हणे कांहीं। निःसंग पाहीं विचरत ॥ २७ ॥ सत्संगा लाधलें आकाश। खुपों नेणे पैं कोणास। विसरोनियां निरवकाश। विरक्त उदास सर्वत्र वसे ॥ २८ ॥ आपुल्या निजशरीरीं। शीत उष्ण पर्जन्यधारीं। न लिंपे एकही विकारीं। सत्संगथोरी एवढी ॥२९॥ ऐसें नगर अवघेंचि संत। श्रीरामभजनीं निरत। धन्य भाक्तिप्रतापें भरत। सौभाग्यवंत नांदत ॥ ३० ॥ कोणाही नाहीं दुर्दशा। कोणी नव्हती हीनमानसा। श्रीरामभजनें उल्लासा। सावकाश नांदती ॥ ३१ ॥ उदीम एकमोहरा करणें। अक्षराचें खरें नाणें। जैसें देणें तैसें घेणें। कोणाही उणें असेना ॥३२॥ एकचि वस्तु देतां घेतां। एका बोलाचीच कथा। एकावांचून सर्वथा। दुजी वार्ता असेना ॥ ३३ ॥ दुजेपणें दे दलाल। ठकूं पाहे तत्काल। सर्वस्वें नेतां न लगे पळ। घेवोनि सबळ जातसे ॥ ३४ ॥ जेथें त्याची उडी पडे। सर्वस्वेंसीं जीवित बुडे। कांहीं उपाय न चले पुढें। पडे रोकडे अनर्थीं ॥ ३५ ॥ अंगळमंगळ नंदभाषा[4]। सवेग निवटूं पाहे घसा। प्राणिया न कळे सहसा। दलाल ऐसा द्वैताचा ॥ ३६ ॥ भरतनगरीं लोक चतुर। स्वयें उदिमी एकांगवीर[5]। होतां द्वैताचा संचार। वृत्ति सत्वर छेदिती ॥ ३७ ॥ एक एक उदीम ऐसा। आकळी सगळिया आकाशा। द्वैताची तेथें कोण

१ वास घेण्यास योग्य. २ नाजूक. ३ सचोटीचा. ४ व्यापारांतील सांकेतिक शब्द. ५ पुष्कळ वीरांशीं लढणारा.

दशा । परम परेशा विनटले ॥ ३८ ॥ हाटवटिया चौवारें । कथाकीर्तन चौफेरें । गातां रामकीर्ती गजरें अंबर झरे तुषारीं ॥ ३९ ॥ आनंद भरताच्या मनीं । गेलें शून्यत्व बुडोनी । चैतन्यघन होउनी । निर्विकार जनीं सुस्थिर ॥ ४० ॥ गर्जतां रामनामें कल्लोळें । गगन अवघेंचि महुरलें । मोक्षफळीं लगडोनि आलें । ऐक्य झालें हरिरंगीं ॥ ४१ ॥

सादृश्यामुळें हनुमंताचा भरताला राम समजून कोपः देखतां नगरवृत्तांत । कपि स्वानंदें डुल्लत । पुढें देखिला भरत । अति विस्मित स्वयें झाला ॥४२॥ जटाधारी वल्कलांबर । तापसवेषी मनोहर । राजीवलोचन[1] श्यामसुंदर । अति मनोहर साजिरा ॥ ४३ ॥ ठाणमाण गुणलावण्य । कळाविन्यास[2] प्रसन्नवदन । देखतां कपि उद्विग्न । रघुनंदन येथें कां आला ॥ ४४ ॥ मनोमय करोनी नमन । रणपुरुषार्थें क्षोभोन । काय बोलत कपिनंदन । कोण विघ्न तुज आलें ॥ ४५ ॥ म्हणवितोसी आत्माराम । दिससी दुःखाचा आराम । रणीं सांडिला युद्धधर्म । परम अधर्म तुवां केला ॥ ४६ ॥ धीर वीर परम उदार । रणप्रवीण महाशूर । पुराणें गर्जती अपार । तें समग्र लटिकेंचि ॥ ४७ ॥ लटिकें तुझें कुळ शीळ । लटिकें तुझें व्रत सकळ । लटकें तुझें प्रतापबळ । लटिकाच केवळ पुरुषार्थ ॥ ४८ ॥ तुज पुरुषत्वचि नाहीं कांहीं । स्त्रीत्वही तुजमाजी नाहीं । नपुंसकाहूनि पाहीं । वेष तोही लटिकाचि ॥ ४९ ॥ लटिकी तुझी धृती कीर्ती । लटिकी तुझी शौर्यशक्ती । लटिकी तुझी स्थिती गती । लटिका निश्चितीं श्रीराम ॥ ५० ॥ वृथाचि वाढविलें नाम । वृथा तुझे नेमधर्म । वृथा तुझे धर्माधर्म । रघूत्तम वृथाचि ॥ ५१ ॥ जितुका पुरुषार्थ केला । तितुका वायांचि वाढविला । क्षात्रधर्मा बोल लाविला । रणीं सांडिला सौमित्र ॥ ५२ ॥ बिभीषण शरणागत । वानर सांडिले अनाथ । सुग्रीव सांडिला तेथ । रावणें घात करावया ॥ ५३ ॥ आम्ही एक एक गोळांगूळ । गिळूं शकूं ब्रह्मांडगोळ । कायसें रावणाचें बळ । रणीं सकळ जिंकावया ॥ ५४ ॥ घायीं तळमळी सौमित्र । रणीं सांडोनि सत्वर[3] । पळालासी तूं रघुवीर । बाण समोर धाडिला ॥ ५५ ॥ मुहूर्त एक राहतासि तेथें । क्षणें आणितों औषधींतें । उठवोनियां सौमित्रातें । रावणातें मारितों ॥ ५६ ॥

भरताला आश्चर्य व हनुमंताला वस्तुस्थिति कथनः—श्रीरामा थोर अन्याय केला । विकळ बंधु रणीं सांडिला । ऐकतां भरत चकित जाला । पाहूं लागला आकाशीं ॥ ५७ ॥ कपि रूपें पर्वताकार । पुच्छीं बांधोनि डोंगर । गगनीं जातसे सत्वर । गर्जत थोर रामनामें ॥ ५८ ॥ दिसे अति बळें बळवंत । कळिकाळा दृष्टी नाणित । बाण देखोनि नामांकित । सत्वर येथ पैं आला ॥ ५९ ॥ होय रामदूत साचार । युद्ध मांडलें घोरांदर । पर्वत घेवोनि सत्वर । करावया संहार जातसे ॥ ६० ॥ प्रसंगें येथें हा पातला । पुसों वृत्तांत[4] वहिला । चौदा वर्षांमाझीं भेटला । रामें धाडिला कृपाळुत्वें ॥ ६१ ॥ श्रीराम दीनदयाळ । राम भावार्थभुकाळ । राम सप्रेम स्नेहाळ । प्रणतपाळ श्रीराम ॥ ६२ ॥ राम जीवाचें जीवन । राम जीवाचें अंजन । जीवीं जीवा समाधान । राम चिद्घन बोल्ला ॥ ६३ ॥ रामकथेवीण येथ । बहुत दिवस होतों पीडित । रामें कृपा करोनि त्वरित । कपिपर्वत पाठविला ॥ ६४ ॥ यासी पुसतां प्रवृत्ति समग्र । रामकथा सविस्तर । आम्हां सांगेल वानर । अति चतुर दिसताहे ॥ ६५ ॥ ऐसें विचारोनि मनीं । भरत सादर रामश्रवणीं । पुसता झाला तत्क्षणीं । प्रेमेंकरोनि कपीसी ॥ ६६ ॥ कोण कैंचा आलासी कोठोनी । पुच्छीं पर्वत काय म्हणोनी । रामभेटी तुज कैसेनी । कोपेंकरोनी बोलसी ॥ ६७ ॥ राम कैंचा कोठील कोण । तुज कोपाया काय कारण । कोठें पडिला लक्ष्मण ।

१ कमळनेत्र. २ कळांची उपस्थिति. ३ सत्वर. ४ शरणागतांचें रक्षण करणारा. वृत्तांत.

मुहूर्त = ४८ मि

बानरगण ते कैंचे ॥ ६८ ॥ कैंचा बिभीषण शरणागत । कोठें रावणेंसीं झुंज होत । लक्ष्मण कैंवी झाला मूर्च्छित । कोण हेतु युद्धासीं ॥ ६९ ॥ कोण्या अर्था तूं गेलासी । पर्वत कशालागीं नेतोसी । वेळोवेळां राम स्मरसी । रामीं तुम्हांसीं सख्य कैंचे ॥ ७० ॥ हा समूळ माझा संदेहो । तुवां छेदावा महाबाहो । म्हणें उदास होसी पहा हो । कथान्वयो सांगतां ॥ ७१ ॥ तुझे मुखीं रामस्मरण । म्हणोनि तुज आलों शरण । पुढती घालितों लोटांगण । रामकथन मज सांग ॥ ७२ ॥ भरत प्रेमाचा संपूर्ण । प्रेमें बांधिला कपिनंदन । न ओळखोनि भरतचिन्ह । राम म्हणोन उपहासी ॥ ७३ ॥ उपहासमिषें कपिनाथ । श्रीरामातें वर्णित । सूक्ष्म सर्वगत अनंत । सदोदित सांगत ॥ ७४ ॥

हनुमंताचा राग कायम :–किती नेणतेपण घेसी । लटिकाचि प्रेमा दाविसी । जगासीं जैसा ठकवितोसी । तैसें मजसीं चालेना ॥ ७५ ॥ उघड सर्वत्र अससी । असोनि विश्वा वेड लाविसी । जगींच जगा न दिससी । पाहातां लपसी सूक्ष्मत्वें ॥ ७६ ॥ जे जे पहावया निघाले । ते ते उघडे नागवले । नागवे हळहळीत केले । हिंडविले दिगंतीं ॥ ७७ ॥ एकीं अन्नचि वर्जिलें । एक पाला खाऊं लागले । एकीं तृणरस सेविले । पाहूं लागले तुजलागीं ॥ ७८ ॥ एकां माथां जटाभार । एकीं बळविलें शरीर । एक सेविती उदक मात्र । एकीं नीरही सांडिलें ॥ ७९ ॥ एक झाले वल्कलांबर । एक चर्माच्छादनपर[१] । एकां तृणाचें शेजार । एकां सविस्तर नखकेश ॥ ८० ॥ एक झाले जी बोडके । दंडी मुंडी भगवे सुडके । एकीं वेढिलें फडकें । एक बोलके अति चतुर ॥ ८१ ॥ ऐसे पाहती तुजलागीं । सर्वथा न दिससी जगीं । असोनि त्यांच्या सर्वांगीं । भ्रमण वेगीं करविसी ॥ ८२ ॥ तें मजसीं न चले मत । मी जाणतसें समस्त । लपलासी जेथ तेथ । मी समस्त सांगेन ॥ ८३ ॥ पाहत्याभेणें लपसी । बापुडीं वेडा लाविसी । शेवटीं पाहणें होऊन राहसी । हें कोणासीं लक्षेना ॥ ८४ ॥ निर्धारें माग काढितां । वेळ न लगे जळीं बुडतां । मत्स्याऐसा तळपतां । लाज सर्वथा असेना ॥ ८५ ॥ ओळखोनि धरितां येथ । रूप आणिकचि धरित । हात पाय पोटीं घालून तेथ । पाठी करित अति निबर[२] ॥ ८६ ॥ पर्वत पडिल्या पाठीवरी । ओळखी न देसी तरी । तेथें धरितां निर्धारीं । रूपांतरीं लपतोसी ॥ ८७ ॥ धावण्या धांवतां मार्गेसीं । भेणें भेणें शूकर होसी । वेगीं दांतीं भोय धरिसी । करुणा भाकिसी अनिवार ॥ ८८ ॥ तेथें ओळखितां निर्धारीं । जाभाडें पसरोनि भारी । गुरगुर करिसी खांबाभीतरीं । नरना केसरी होऊन ठाकसी ॥ ८९ ॥ नख केश तिखट भारी । हातें धरोनि अंगावरी । उदर चिरोनि नखाग्रीं । करिसी बोहरी[३] पाहत्याची ॥ ९० ॥ निर्धारितां निष्टंक । होसी बापुडा भिकारी रंक । दीन कुब्ज होवोनि देख । बळीपासीं भीक मागसी ॥ ९१ ॥ बळी राजा चतुर भारी । तेणें ओळखोनि निर्धारीं । धरोनि द्वारपाळ करी । अद्यापिवरी तिष्ठत ॥ ९२ ॥ तेथून लपतां लवडसवडें । माग न सांडिती मागाडे[४] । मग आपुले मायेचें मडें । निजनिवाडें काढिसी ॥ ९३ ॥ लटकीच मोकलोनि धाये । रडसी ये माये ये माये । लोक म्हणती झालें काये । अपूर्व पाहें केवढें ॥ ९४ ॥ आतांचि पाहां पां रोकडें । किती मेळविलीं माकडें । सागरीं तारोनियां गुंडे । लंका कैवाडें घेतली ॥ ९५ ॥ करोनियां महारण । मारविला लक्ष्मण । शरणागत बिभीषण । तोही सांडून पळालासी ॥ ९६ ॥ तूं राम मी मारुती । लपणी न चले मजप्रती । ऊठ चाल शीघ्रगतीं । ऊर्मिलापती उठवावया ॥ ९७ ॥ घेवोनि मोहाची बुंथी[५] । घेवोनियां दीनवृत्ती । कोण म्हणोनि मजप्रती । पुसों निश्चितीं आलासी ॥ ९८ ॥ एक उरलासे रावण ।

१ कातडें पांघरणारे, २ कठिण. ३ नाश. ४ शोधक. ५ आवरण, पांघरूण, पडदा.

त्यासी मारितां न लगे क्षण । न येतां पुच्छीं बांधोनि नेईन । सत्य जाण श्रीरामा ॥ ९९ ॥ उठवीन लक्ष्मण । निर्दळीन रावण । अभिषेकीन बिभीषण । तरी मी दूत जाण रामाचा ॥ १०० ॥ सोडवीन सीता सुंदरी । सुर सोडवीन निजगजरीं । सुरवरांचे जयजयकारीं । अयोध्यानगरीं प्रवेशों ॥ १ ॥ इतुकें केल्यावीण सर्वथा । तुज ढळों नेदीं मी श्रीरघुनाथा । वायां चुकवूं नको आतां । ऊठ तत्वतां जाऊं तेथें ॥ २ ॥ धूरलक्षण ऐसें नव्हे । जेणें स्वामित्वास बाधा पावे । ऐसें न धरावें राघवें । वेगीं निघावें युद्धासी ॥ ३ ॥ तूं युद्धधर्म सांडिसी । दूषण लागे सूर्यवंशासी । आणि सकळांतें मारविसी । हत्या घेसी निजमाथां ॥ ४ ॥ पूर्वी शिष्टाईचे वेळे । झुंझों नेदिसी गोळांगुळें । एकाचेनि पापबळें । दीनें सकळें केंवी मारूं ॥ ५ ॥ ऐशा कृपाळु रघुनाथा । न विसंबसी निजभक्तां । तें सकळ रणीं सांडितां । दयाळुता काय झाली ॥ ६ ॥ स्वर्गीं चिंतिती सुरवर । रावणा मारील रामचंद्र । बंध सोडवील समग्र । निरंतर वाट पाहती ॥ ७ ॥ ऋषि वाल्मीकाचें भाष्य । अनागत अति सुरस । राम मारील रावणास । त्या बोलास साच करीं ॥ ८ ॥ प्रतिपाळावें वेदासी । संरक्षावें पुराणासी । नुलंघावें ऋषिवचनासी । प्रतिज्ञा ऐशी श्रीरामा ॥ ९ ॥ ते प्रतिज्ञा साच करीं । रावणातें जीवें मारीं । शरणागताचा कैवारी । निजभक्तां करीं उल्लास ॥ ११० ॥ अशोक वनिकेमाझारीं । अडकली सीता सुंदरी । तिसी सोडवूनि झडकरी । अभिषेक करीं बिभीषणा ॥ ११ ॥ तुझी आण रघुनाथा । पाऊलही न घालवे सर्वथा । तुजवीण आम्ही सकळ वृथा । असारता भूमिभार ॥ १२ ॥ किती पाहसी निर्वाण । कासया-साठीं धरिसी मौन । तुजवीण न करीं गमन । येथेंचि प्राण आतां सांडीन ॥ १३ ॥ नमन तुझिया पायांसी । लोटांगण चरणांसी । बहुत झालों कासा-विसी । रणीं युद्धासी न वचतां ॥ १४ ॥ अश्रु आले दोहीं डोळां । गात्रें कांपती चळचळां । सर्वांगीं स्वेदकल्लोळ चालिला । कपि विकळ जाऊं पाहे ॥ १५ ॥

(भरत शोकविव्हल व हनुमंताला सत्यकथन:—

देखतां कपीचें चिन्ह । श्रीरामीं प्रेम गहन । भरत झाला मूर्च्छापन्न । देहभावासी जाण विसरला ॥ १६ ॥ नाठवे देहगेहवृत्ती । नाठवे वर्णाश्रम-जाती । नाठवे स्वजनसंतती । जडली वृत्ती श्रीरामीं ॥ १७ ॥ नाठवे क्रियाकर्म । नाठवे धर्माधर्म । नाठवे रूपनाम । भरत सप्रेम पडियेला ॥ १८ ॥) येरीकडे कपिनंदन । झाला अति विस्मयापन्न । श्रीराम न होवोनियां कोण । मज संपूर्ण लक्षेना ॥ १९ ॥ दिसे श्रीरामसादृश्य देहीं । एक अंश उणा नाहीं । रूपलावण्यगुण कांहीं । उणें नाहीं श्रीरामा ॥ २० ॥ ठाणमाण नेटका । मेघश्याम तनु देखा । कांसे पीतांबर सुरेखा । स्वरूप देखा साजिरें ॥ २१ ॥ कपि विचारी मनांत । तंव भरत झाला सावचित्त । घालोनि लोटांगण त्वरित । कपिनाथ विनविला ॥ २२ ॥ तूं रामाचा निजभक्त । सखा जिवलग हनुमंत । रामाज्ञेसीं नित्यांकित । राम सेवित सर्वदा ॥ २३ ॥ मी श्रीरामाचा धाकटा बंधु । भजनहीन महामंदु । नायकें श्रीराम-कथागंधु । अभाग्यसिंधु मी एक ॥ २४ ॥ नायकें श्रीरामाचें नाम । नाठवे श्रीरामाचें कर्म । न देखें श्रीरामाचें प्रेम । भजनाधम मी एक ॥ २५ ॥ तूं सभाग्य कपिनंदना । सबाह्य वेंचिलें श्रीरामभजना । रामेंवीण नेणसी आना । प्रेमा गहन श्रीरामीं ॥ २६ ॥ सर्वेंद्रियांच्या ठायीं । राम कोंदला तुझे देहीं । रामावांचून नेणसी कांहीं । म्हणोनि पाहीं विनवीत ॥ २७ ॥ आजी चौदा वर्षांपाठीं । कपि तुझ्या वाक्पुटीं । ऐकिली श्रीरामाची गोष्टी । तेणें पोटीं अवस्था ॥ २८ ॥ ऐकावया श्रीरामकथा । अंतरीं अनिवार अवस्था । भक्तोत्तमा कपिनाथा ।

१ पुढील. २ भजन न करणारा. ३ उत्कंठा.

उदासता नसावी ॥ २९ ॥ अहर्निशीं हेंचि चिंतित। जो कोणी सांगेल रामचरित। आजी तूं भेटलासी येथ। तरी साद्यंत मज सांग ॥ १३० ॥

हनुमंताला चिंताः–उल्लंघोनि जासी येथ। तरी मज होईल प्राणांत। तुज कोपेल रघुनाथ। उपेक्षिला भरत काय म्हणोनी ॥ ३१ ॥ तिकडे स्वामी क्षोभेल। इकडे माझा प्राण जाईल। उभय संकटीं शिणशील। विश्वही बोल तुज लावील ॥ ३२ ॥ सद्दढ मनीं विवंचून। मज द्यावें समाधान। ऐकोनियां कपिनंदन। लोटांगण घालित ॥ ३३ ॥ मज सांगतां वृत्तांत। विलंब लागों पाहे येथ। उदया येतांचि भास्वंत। होईल घात सौमित्रा ॥ ३४ ॥ ब्रह्मशक्ति महादारुण। वरी पडतां रविकिरण। सौमित्राचा जाईल प्राण। म्हणोन त्वरेनें जातसें ॥ ३५ ॥ जरी प्रीती सौमित्रासीं। श्रीरामातें पाहूं इच्छिसी। तरी गोवूं नको मजसीं। ओषधींसी नेऊं दे ॥ ३६ ॥ तुज माझें लोटांगण। शीघ्र द्यावें आज्ञापन। विलंबीं होईल महाविघ्न। प्राण लक्ष्मण सोडील ॥ ३७ ॥

भरताचें सूर्योदय थोपविण्याचें हनुमंताला आश्वासनः–ऐकतां कपीची मात। भरत क्रोधें कृतांत। उदया येतां भास्वत। करीन घात तयाचा ॥ ३८ ॥ वाहतों श्रीरामाची आण। वृत्तांत न सांगतां संपूर्ण। तत्काळ माझा जाईल प्राण। अर्ध क्षण न लागतां ॥ ३९ ॥ एका वांचवूं जातोसी। दुजियातें जीवें मारिसी। इतुकेनि सुख नव्हे श्रीरामासी। कपि जाणसी तें करीं ॥ १४० ॥ माझा प्राण जाईल येथ। शत्रुघ्न तत्काळ करील घात। तिघी माता त्वरित। प्राणघात करतील ॥ ४१ ॥ ऐकोनी युद्धकथा। आकांत होईल गा समस्तां। साद्यंत वृत्तांत न सांगतां। करिशील घाता सर्वांच्या ॥ ४२ ॥ मग येथील चरित्र। श्रीरामासी सांग सविस्तर। मारोनि माता सहोदर। येथें सत्वर मी आलों ॥ ४३ ॥ ऐकोनियां भरतवचन। हनुमान अत्यंत विस्मयापन्न। यासी न देतां समाधान। गमन आपण करूं नये ॥ ४४ ॥ उल्लंघितां भरतासी। राम क्षोभेल मानसीं। जगीं होईन अपेशी। सज्जनासी उल्लंघितां ॥ ४५ ॥ ओषधी मंदतेज होती। वेगें क्षोभेल रघुपती। हे चुकवावी अपकीर्ती। भरत चित्तीं सुखावूं ॥ ४६ ॥ उदयां येतां गभस्ती[१]। त्यासी मारीन निश्चितीं। रवि माझी जाणे शक्ती। बाळपणीं ख्याती केली जे ॥ ४७ ॥ आतां तरी झालों टणक। श्रीरामभजनीं अवंचक[२]। रवि बापुडें कोण मशक। उदया देख यावया ॥ ४८ ॥ ऐसें विचारोनि मानसीं। छळणें पुसे भरतासी। उदया येतां रवीसी। अनर्थासी कारण ॥ ४९ ॥ ऐकोनि कपीचें उत्तर। पोळलें भरताचें अंतर। बोलों आदरिलें खडतर। कपि उत्तर ऐकत ॥ १५० ॥ न साधतां रामकार्यासी। उदय पावतां रवीसी। समूळ छेदीन मी त्यासी। बाणाग्रेंसीं क्षणार्धे ॥ ५१ ॥ तुज उशीर होईल जरी। तरी सपर्वत बाणाग्रीं। बैसवोनियां रामशरीं। क्षणामाझारीं पाववीन ॥ ५२ ॥ एका जनार्दना शरण। हनुमान देईल समाधान। अति गोड निरूपण। सावधान परिसावें ॥ ५३ ॥ चतुर एका जनार्दन। करितां निजगुणानुकथन। शब्दासी उपरति होऊन। निजरूपीं लीन तो झाला ॥ ५४ ॥ स्वयें निजरूपीं लीन झाला। तरी न राहे उगला। निजकथा गावया वहिला। राहून ठेला साक्षित्वें ॥ ५५ ॥ कदाचित चुकवूनि जाये। म्हणऊन आड उभा राहे। सरसाचि लागला आहे। परता नव्हे अणुमात्र ॥ ५६ ॥ तरी भरंवसा नाहीं पोटीं। म्हणऊन श्रीरामासीं मज गांठी। घालोनि ठेला अवचटीं। अति संकटीं सांडीना ॥ ५७ ॥ लागलासे जेथ जेथ। कांहींही न चले मत। शोधूनि अहंबुद्धि चित्त। क्षीणवृत्त मज केलें ॥ ५८ ॥ सबाह्य माझा करोनि गोळा। एकाएकीं पालटोनि ठेला। उपाय

१ सूर्य.

२ निष्कपट.

सर्वथा तुटला । पडल्या पडल्या गाववी ।। ५९ ।। झणें मी मौनी राहें । म्हणोनि वाचेसीं स्वयें होये । निजकीर्ती स्वयें गाये । करूं काय मी आतां ।। १६० ।। कांहीं न चले सर्वथा । चौखंरिलोंचि तत्वतां । शरण आलों साधुसंतां । विचार आतां मज सांगा ।। ६१ ।। नेणें प्रेमाचे बोल । प्रमेय उथळ कीं सखोल । नेणें योजूनि बोलें बोल । वक्ता केवळ श्रीराम ।। ६२ ।। नेणें पदबंधव्युत्पत्ती । रीघ नाहीं संस्कृतीं । लेखणी देवोनी हातीं । राम निजकीर्ती लिहवितो ।। ६३ ।। यालागीं जी स्वामिनाथा । मज बोल नाहीं सर्वथा । वरद हस्त माझे माथां । ठेवून आतां क्षमा कीजे ।। ६४ ।। तंव कृपाळु साधुजन । उभय हस्तें आलिंगून । स्वयें बोलते झाले वचन । अमृताहून सुखकारी ।। ६५ ।। तूं कां भाकितोसि करुणा । कासयासी होतोसि दीन । वक्ता एक जनार्दन । तेथें तूं कोण परिहारा ।। ६६ ।। तुझेनि मुखें हे कथा । आवडली श्रीरघुनाथा । वाचे वचन आणि वक्ता । स्वयें तत्वतां होवोनि ठेला ।। ६७ ।। फुंक भरोनि मसकेसीं । आवडे स्वामीचिया मानसीं । ध्वनि वाजवी जैसी तैसी । संबंध मसकेसीं असेना ।। ६८ ।। ऐसें निजकृपा साधुवचन । निवविला एका जनार्दन । उल्लास पावोन चौगुण । लोटांगणें विनवीत ।। ६९ ।। पुढील कथानुसंधान । भरतरामकथाश्रवण । करोनि कपीचें पूजन । बाणीं बैसवून बोळवील ।।१७०।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां भरतहनूमद्दर्शनं नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ।। ४७ ।। ओंव्या ।। १७० ।। श्लोक ।। १ ।। एवं ।। १७१ ।।

---

# अध्याय अठ्ठेचाळिसावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## श्रीरामांच्या क्रोधाचें शमन

भरतास वंदन करून हनुमंताचें वृत्तांत-कथन :-

देखोनि भरतप्रेमासी । नमन करोनि वेगेंसीं । सांगावया रामकथेसी । प्रेम कपीसीं अनिवार ।।१।। आम्हां निश्चयमनें । स्वयें राम अनुभवणें । जगीं रामरूप देखणें । भरतोल्लंघन केंवी घडे ।। २ ।। बंधु धाकटा रामाचा । तोही आम्हां राम साचा । केंवी उल्लंघूं याची वाचा । लावीन कथेचा अन्वय ।।३।। भरता ऐकें सावधान । चित्रकुटीं रघुनंदन । देवोनि तुम्हांसी समाधान । पुढारें गमन मांडिलें ।। ४ ।। घेवोनि अगस्तीची भेटी । सांगोनियां गुह्य गोष्टी । शरभंगऋषि जगजेठी । उठाउठीं उद्धरिला ।। ५ ।। बिराध येवोनि आडवा । सीता उचलोनि निघे तेधवां । रामें करोनि बाणलावा । महाग्राहो मारिला ।। ६ ।। जटायूसीं सख्य पडिलें । येवोनि पंचवटीसीं राहिले । आश्रम मनोरम रचिले । रावण ठेविलें जटायूसी ।। ७ ।। करितां वनविहारासी । सौमित्रें मारिलें शंबरासी । शूर्पणखा माता होय त्यासी । लक्ष्मणासी छळूं आली ।। ८ ।। सौमित्रें केलें विंदान । सवेग छेदिले नाक कान । खरदूषणां गेली शरण । रामलक्ष्मण मारावया ।। ९ ।। चौदा सहस्र रक्षोगणें । त्रिशिरा आणि खर दूषण । श्रीराम लक्षोनी आपण । दारुण रण करूं आले ।। १० ।। एकलेनि रामें आपण । मारिले न लागतां क्षण । मुक्त करोनि जनस्थान । द्विजां दान दिधलें ।। ११ ।। ऐकोनियां ते मात । तळमळी लंकानाथ । सीताहरणासी उद्यत । छळणार्थ करूं आला ।। १२ ।। मृगवेष दिधला मारीचासी । देखतां सीता उल्लासी । त्वचा मागे

---

१ चोहोंकडे बांधिला गेलों. २ चामड्याच्या पिशवीस. ३ राक्षससमूह.

कांचोळीसीं । श्रीराम त्यासी मारूं गेला ॥ १३ ॥ मायेचा मृग निघे बाहेरी । राम काढोनि नेला दूरी । जटायु चरूं गेला वनांतरीं । सीता सुंदरी एकली ॥ १४ ॥ रक्षण ठेविला लक्ष्मण । ऐकोनि मायामृग वचन । त्याचें करोनियां छळण । दिला दवडोनि सीतेनें ॥१५॥ रावण येवोनि कपटेंकरीं । हरिली जानकी सुंदरी । जटायु धांवला झडकरी । त्यासी मारी रावण ॥१६॥ राम आला धांवोन । तंव जटायूसीं होतां प्राणोत्क्रमण । करोनि त्याचें उद्धरण । पुढें आपण चालिला ॥१७॥ हातपायावीण मोधळा । कबंध गिळावया आला । रामें निजबाणें छेदिला । पाठविला वैकुंठा ॥ १८ ॥ पंपातीरीं महावीर । आम्ही भेटलों वानर । स्वामी मिनलों रामचंद्र । भाग्य थोर आमुचें ॥ १९ ॥ वालिसुग्रीवां वैर भारी । दारराज्यें हिरोनि झडकरी । आम्हां घालोनि बाहेरी । राज्य करी किष्किंधे ॥२०॥ शरण आलों रामासीं । रामें कुढाविलें आम्हांसी । मारोनियां वाळीसी । सुग्रीवासी स्थापिलें ॥ २१ ॥ वालिसुत युवराजा । करोनि सीताशुद्धीचिये काजा । झडकरी पाठविला वोजा । सांगातें मज दिधलें ॥ २२ ॥ सीताशुद्धी आणिली तिहीं । मग निघाले लवलाहीं । कपिसैन्य चालवीत पाहीं । दोहीं बाहीं रघुराजा ॥ २३ ॥ बिभीषण शिकवी रावणासी । न मानी तो त्याच्या वचनासी । लाता हाणितल्या त्यासीं । तो आला रामापासी पैं शरण ॥२४॥ वानरसैन्य अपरिमित । हातीं पर्वत झेलित । सागरीं घालिती त्वरित । हेळांचि सेतू बांधिला ॥२५॥ करोनियां लंकालाग । वानर प्रवेशले दुर्ग । आगी लावोनि वस्तु सवेग । अनेक जाळिल्या ॥ २६ ॥ राक्षससैन्य बहुसाल मरतां । कृपा उपजली भगवंता । एकाचिया अपराधता । लोकां समस्तां केंवी मारूं ॥ २७ ॥ श्रीराम दीनदयाळ । श्रीराम स्वयें स्नेहाळ । श्रीराम कृपाकल्लोळ । प्रणतपाळ श्रीराम ॥२८॥ राम कृपेचा कोंवळा । राम जीवींचा जिव्हाळा । राम कृपाळु कळवळा । लोकां सकळां देखोनी ॥२९॥ रामें जगाची उत्पत्ती । रामें जगाची स्थितिगती । रामें जगाची विश्रांती । सच्चिन्मूर्ति श्रीराम ॥ ३० ॥ निरपराधें केंवी मारूं । म्हणोनि मांडिला शिष्टाचारु । पाठविला अंगदवीरु । अति चतुर बोलका ॥३१॥ तेणें शिकविला बहुत रीतीं । तें न मानेचि लंकापती । मग मांडिली युद्धख्याती । केली शांती राक्षसां ॥ ३२ ॥ युद्ध झालें घोरांदर । मंत्री प्रहस्तादि महोदर । इंद्रजितादि महावीर । कुमरें कुमर मारिले ॥ ३३ ॥ महाबाहु कुंभकर्ण । उभा चिरिला विंधोनि बाण । आधीं नाक कान कापून । शिरःकमळ जाण छेदिलें ॥३४॥ बंधुपुत्रांचें दुःख भारी । दहाही मुखीं शंख करी । रावणा दुर्दशा थोरी । सुरासुरीं धाक त्याचा ॥ ३५ ॥ दुःखें आरंबळला बहुत । आतुर्बळी हा रघुनाथ । माझें कांहीं न चले मत । दांत खात करकरां ॥ ३६ ॥ अदट वीर कुंभकर्ण । रामें मारिला विंधोन बाण । इंद्रजित महावीर दारुण । सौमित्रें जाण निवटिला ॥ ३७ ॥ प्रधान मारिले आघवे । सैन्य सेनानी गेले जीवें । एकलें म्यां काय करावें । रणीं नागवे रघुनाथ ॥ ३८ ॥ दांत करकरां खात । डोळे गरगरां भवंडित । रागें दोनी हात चुरित । शक्ति अद्भुत उचलिली ॥३९॥ शरणागत मारूं आपण । त्याकारणें सांडितील हे प्राण । लक्षूनियां बिभीषण । शक्ति जाण हाणितली ॥ ४० ॥ वेगीं लक्ष्मण धांविन्नला । पाठीसीं शरणागत घातला । शतधा शक्ति छेदून ठेला । गाढा दादुला सौमित्र ॥ ४१ ॥ मंत्रीं खिळिल्या अति निगुतीं । परततां न ये मागुतीं । ऐसें विचारोनि चित्तीं । आली काकुळती सौमित्रा ॥ ४२ ॥ मज खिळिलें अभिमंत्रून । क्षीण माझी आंगवण । मागें सरतां रावण । दंड संपूर्ण मज

१ गोळा. २ प्राप्त झाला. ३ स्त्री आणि राज्य. ४ आश्रय दिला. ५ लीलेनें, सहज. ६ आक्रोशला.

करील ॥ ४३ ॥ म्हणऊन तुज मी आलें शरण । तूं शरणागतशरण्य । नुपेक्षावें मजलागून । कन्या पूर्ण मी तुझी ॥४४॥ कन्या होवोनि शरण झाली । देखोनि अत्यंत कृपा आली । सौमित्र शरणागता माउली । अंगीकारिली ब्रह्मशक्ती ॥ ४५ ॥ कन्या झाली उपहेत । जनक तिसी अंगीकारित । सौमित्र अत्यंत कृपाभरित । थारा देत निजहृदयीं ॥४६॥ जरी उपेक्षूं इयेसी । तरी जगीं होईन उपहासी । ब्रह्मवरद ये शक्तीसीं । ब्राह्मण आम्हांसीं निजपूज्य ॥ ४७ ॥ द्विजवचन उपेक्षितां । पूर्ण अपजयो बैसेल माथां । वधिलें जरी शरणागता । तरी अनर्था-माझारीं पडिजे ॥ ४८ ॥ जीवें जातां शरणागत । प्राण सांडील रघुनाथ । सुग्रीवादि कपि समस्त । प्राण निश्चित सांडितील ॥ ४९ ॥ मग माझें जिणें काय । वृथा भूमीसीं भार होय । चुकवावया सकल अपाय । जीवें पाहें बिनटला ॥ ५० ॥ संरक्षितां शरणागत । सुख वानरां समस्त । सुखावेल श्रीरघुनाथ । सुर समस्त सुखी होती ॥ ५१ ॥ राम वधील रावणा । अभिषेकील बिभीषणा । सिद्धी पावेल पूर्णपणा । वरदवचन रामाचें ॥५२॥ एकल्या माझ्या जीवासाठीं । उल्लासती ब्रह्मांड-कोटी । राम विजयी सकळ सृष्टीं । मजसाठीं होईल ॥ ५३ ॥ ऐसें विचारोनि चित्तीं । पसरिली अंगाची वाखती । हृदयीं झेलिली ब्रह्मशक्ती । केली ख्याती सौमित्रें ॥ ५४ ॥ शक्ति भेदितां लक्ष्मणा । गर्जे सिंहनादें रावण । त्यावरी चालिला रघुनंदन । धनुष्यबाण सज्जूनी ॥ ५५ ॥ सोडूनियां निर्वाण-बाण । तत्काळ मारावा रावण । येरें साधिलें विंदाण । पाठी देऊन पळाला ॥ ५६ ॥ पळाल्या-वरी रामरावो । सर्वथा न करी घावो । ऐसा जाणोनि दृढ भावो । रावण पाठी देवोनि पळाला ॥ ५७ ॥ पळवोनियां रावण । विजयी झाला रघु-नंदन । पाहूं आला लक्ष्मण । तंव मूर्च्छापन्न देखिला ॥ ५८ ॥ कुरवाळोनि अमृतहस्तीं । केली निर्वीर्य ते शक्ती । विशल्य न करीच रघुपती । ब्रह्मवचनापुरती राखिली ॥ ५९ ॥ ब्राह्मणाचा अतिक्रम । सर्वथा न करी रघूत्तम । आदरिला लौकिक धर्म । बंधूत्तम उठवावया ॥ ६० ॥ बोलावोनि सुषेण वैद्यराज । पुसता झाला रघुराज । वेगीं उपाव सांग मज । बंधुराज उठवावया ॥ ६१ ॥ सुषेण वैद्य सुबुद्धी । आणविल्या दिव्यौषधी । शक्ति भेदली हृदयसंधीं । ते त्रिशुद्धी विरवावया ॥ ६२ ॥ सूर्योदय न होतां पहाहो । आणावा ओषधिसमुदावो । म्हणोनि मज धाडी रामरावो । महाबाहो परियेसीं ॥ ६३ ॥ मी आलों वेगवत्तर । नोळखें ओषधिभार । तेथें लागों पाहे उशीर । मग डोंगर उपडिला ॥ ६४ ॥ मार्गी जातां त्वरान्वित । तंव बाण रामनामांकित । देखोनि आलों येथ । तंव अद्‌भुत देखिलें ॥ ६५ ॥ रामरूपें भ्रमलें चित्त । बोल बोलिलों बहुत । ते क्षमा करो रघुनाथ । मर्कट उद्धत अविवेकी ॥ ६६ ॥ देखोनि तुझा आश्रम । अत्यंत झाला विश्राम । मनें विसरलों गमनधर्म । सर्वांही सम रामसुख ॥ ६७ ॥ पक्षी सिद्धांत बोलत । तेणें लाजिला वेदांत । सरस्वतीचित्त भ्रामित । बृहस्पति तेथ वेडावला ॥ ६८ ॥ सांडून सकळ मत्सर । भरताश्रमीं निरंतर । भूतें वर्तती एकत्र । निर्मत्सर रामनामें ॥ ६९ ॥

भरत-हनुमंताची तन्मयता :–वर्णितां श्रीरामाचे गुण । कपीस नाठवे कपिपण । हनुमान झाला मूर्च्छा-पन्न । देहाचें भान विसरला ॥ ७० ॥ देखोनि कपीची अवस्था । भरत ओसंडला चित्ता । श्रीराम-गुणकीर्ति ऐकतां । विस्मित चित्ता होउनी ॥७१॥ मन बुद्धी चित्तवृत्ती । अहंकाराची अहंकृती । रामीं मिळाली निश्चितीं । बाह्य स्फूर्ती विसरला ॥ ७२ ॥ अंग झालें रोमांचित । वाचा झाली प्रेमसद्गदित । नेत्रीं आनंदाश्रु स्रवत । भरत मूर्च्छित पडियेला ॥ ७३ ॥ श्रवणीं ऐकतां श्रीरामचंद्रा । भरता

१ शरण आलेल्यांना आश्रयस्थान असा. २ महासंकटांत पडलेली. ३ छातीचा खळगा.

लागली योगमुद्रा । विसरला तो निद्रा तंद्रा । कृपा रघुवीराची ऐसी ॥ ७४ ॥ नाठवे गेहदेहभान । रामरूपीं जडला पूर्ण । खुंटला बोल तुटलें मौन । भरतपण विसरला ॥ ७५ ॥ भरत विसरला भरतपण । हनुमान विसरला हनुमत्पण । दोघांस नाठवे दोनीपण । तटस्थ पूर्ण श्रीरामें ॥ ७६ ॥ दोघे विसरले दोनीपण । कार्या आठव करी कोण । बाप कृपाळु रघुनंदन । चैतन्य पूर्ण चेतविलें ॥ ७७ ॥ जीवनकळा सावध केली । प्राणशक्ति परिचारिली । इंद्रियां पाटवता झाली । झांपडी उघडली नेत्रांची ॥ ७८ ॥ चित्त चेतनेतें धरित । मन पूर्वसंकल्प आठवित । बुद्धि निश्चयातें अंगिकारित । रामकार्यार्थ साधावया ॥७९॥ अकस्मात सावध होये । म्हणे मज झालें काय । उगाचि येथ तटस्थ आहें । आठव नोहे स्वामिकाजा ॥८०॥ करूं पाहे उड्डाण । भरतें घातलें लोटांगण । मज सनाथ न करितां पूर्ण । केंवी प्रयाण करूं पाहसी ॥ ८१ ॥ भोजन करावें येथें । तीर्थप्रसाद द्यावा मातें । उपेक्षूं नये आर्तातें । तुम्ही निजचित्तें कृपाळु ॥ ८२ ॥ घरा आलिया श्रीरामभक्त । पूजा न करितां जावूं देत । त्याच्या सकळ कर्मांचा घात । अधःपात तो भोगी ॥ ८३ ॥ ऐसी निजधर्मविवंचना । तूं जाणतोसी कपिनंदना । सर्वथा उदास न करीं मना । म्हणोनि चरणां लागलों ॥ ८४ ॥ येरें वारिला त्वरित । जैसा राम तैसा भरत । वेळोवेळां पायां लागत । हें अनुचित सर्वथा ॥ ८५ ॥ ऐकोनि कपीचें वचन । भरत झाला हास्यवदन । तुज सकळ धर्माचें निजज्ञान । मज चाळवण कां करिसी ॥ ८६ ॥

ब्राह्मणं कुलसम्पन्नं भक्तं विष्णोर्महात्मनः ।
आयांतं वीक्ष्य नोत्तिष्ठेत्स दुःखैः परिभूयते ॥१॥

◇ सर्वांसीं अग्रजन्मा ब्राह्मण । कुळशीळसगुणगुण । वेदशास्त्रसंपन्न । आलिया आपण पूजावा ॥८७॥ भलतैसा हो कां भक्त । श्रीरामभजनीं रत । भगवद्बुद्धीनें पूजा करीत । तोचि संत सर्वज्ञ ॥८८॥ ज्ञानी आत्मा विश्वाचा । भगवंतचि स्वयें साचा । त्यासी पूजी तो दैवाचा । परमार्थाचा असेल भागी ॥८९॥ त्याचें करील जो उपेक्षण । तो महादुःखें दारुण । भोगी आकल्पांत पूर्ण । ऊर्ध्वगमन असेना ॥ ९० ॥ तूं तंव भजनभक्तीचें । केवळ हृदय श्रीरामाचें । सबाह्य अभ्यंतर साचें । निश्चयाचें रामभजन ॥ ९१ ॥ ज्ञान तरी अत्यद्भुत । जग ब्रह्मरूप देखत । ब्रह्मानंदें सदा डुल्लत । ब्रह्मभूत कपिनाथ ॥ ९२ ॥ ऐसियासी देखोन । जो न करी पूजन नमन । तो महापापी पूर्ण । रामदर्शन त्यास कैंचें ॥ ९३ ॥ राम साधूचिये दृष्टीं । राम साधूचिये गांठीं । राम साधूचिये पोटीं । सज्जन भेटीं राम भेटे ॥ ९४ ॥ राम साधूचिये वृत्तीं । राम साधूचिये स्थितीं । राम साधूचिये भक्तीं । श्रीरामप्राप्ती सत्संगें ॥ ९५ ॥ राम सत्संगा आतुडला । राम सत्संगा विकला । राम सत्संगा लाधला । राम राहिला सत्संगें ॥ ९६ ॥ भक्तां सबाह्य श्रीरामरावो । कपि स्वयें भक्तरावो । भाग्यें भेटला महारावो । सभाग्य पहा हो केवढा मी ॥ ९७ ॥ ऐकोनि भरताचें उत्तर । हनुमान झाला चिंतातुर । भरता नमूनि सत्वर । काय कपींद्र बोलिला ॥ ९८ ॥ श्रीरामानुजा तुझें वचन । सर्वथा नुल्लंघवे पूर्ण । संकोचित अंतःकरण । तें सावधान अवधारीं ॥ ९९ ॥ सौमित्र पडिला विसंज्ञ । नाहीं घेतलें जीवन । येथें मी करितां भोजन । तेंचि दूषण रामभजनीं ॥१००॥ श्रीराम बैसला सचिंत । वानरभार शोकाकुलित । बिभीषण दुःखें तळमळित । मजचि येथ आहार केंवी ॥ १ ॥ स्वामी भरता विनंती ऐक । मज द्यावें चरणोदक । संभावना सकळिक । तेणें देख पावली ॥ २ ॥ तुझें चरणतीर्थ घेतां । विजयी होईन सर्वथा । सौमित्रा उठवीन तत्वतां । लंकानाथा जीवघात

१ सुस्ती. २ जागृत केली ३ पटुत्व. ४ फसवणें. ५ जन्मानें श्रेष्ठ.

॥ ३ ॥ उभवोनि रामराज्याची गुढी । तुटेल देवांची बांदवडी । सीता सोडवीन तांतडीं । येथें रोकडी आणीन ॥ ४ ॥ म्हणोनि चरणीं ठेविला माथा । तंव भरत म्हणे मागुता । कांहीं विनवीन कपिनाथा । तें तत्वतां ऐकावें ॥ ५ ॥

भरतानें हनुमंताची बाणावरून रवानगी केलीः–

श्रीरामदर्शना चित्त । बहुत झालें उत्कंठित । आज्ञे-स्तव आलों येथ । कांहीं मत चालेना ॥ ६ ॥ बाण तुज सबें देईन । त्यावरी करीं आरोहण । माझें वरचें लोटांगण । श्रीरामा आपण करावें ॥ ७ ॥ इतुकेनि कृतकृत्य । झालों तुझेनि सनाथ । तूं कृपाळु श्रीरामभक्त । मनोगता रक्षावें ॥ ८ ॥ श्री-रामनाम स्मरतां । तुज श्रम नाहीं सर्वथा । जाणोनि माझ्या मनोगता । वचनार्था संपादीं ॥ ९ ॥ ऐकोनि भरतवचन । हनुमंत विस्मयापन्न । कोण उल्लंघी तुझें वचन । म्हणोनि चरण वंदिले ॥ १० ॥ बाचेसीं पडिलें महामौन । राहिला दोन्हीं कर जोडून । येरें चापीं सजोनियां गुण । सीतीं बाण लाविला ॥ ११ ॥

श्रुत्वेति तस्य वचनं भरतः शराग्रे
सादिं कपिं समधिरोप्य गुणेन योज्य ।
मोघं धनुर्झटिति कुंडलितं चकार
तुष्टाव तं परमविस्मयमागतस्य ॥ २ ॥

भरतप्रेम अद्भुत । प्रेमें बांधला कपिनाथ । सर्वथा कांहीं न चले मात । ब्रैसे पर्वतसह बाणाग्रीं ॥१२॥ करोनि प्रदक्षिणा नमन । घेतलें चरणतीर्थ मागोन । बाणीं करितां आरोहण । येरें संधान योजिलें ॥ १३ ॥ बोढी काढोनि कानाडी । वरी बैसाविला पेरबडी । गुणीं जोडून झडाडी । बाण प्रौढी सोडिला ॥ १४ ॥ करोनियां रामस्मरण । भरतें सोडिला निजबाण । कपि करोनियां राम-स्मरण । गगनीं सबाण उसळला ॥ १५ ॥ हनुमान जातां गगनांत । गगन अवघें लखलखित । दिव्य तेज अद्भुत । तेजें भास्वत आच्छादे ॥ १६ ॥ दिव्य दुंदुभि सुरवरीं । स्वर्गीं त्राहाटिल्या भेरी । पुष्पवृष्टी सुरवरीं । केली शिरीं कपीच्या ॥ १७ ॥ गंधर्वांचें गायन । सिद्धांचें जयजयकारें गर्जन । देवांगनांचें नर्तन । कपीचें गर्जन निजगजरें ॥ १८ ॥ विजयी झाला कपींद्र । आतां उठवील सौमित्र । निवटून राक्षसभार । दशशिर मारील ॥ १९ ॥ तुटेल देवांची बांधवडी । नृत्य करिती तांतडी । स्वर्गीं उभवोनी गुढी । जयजयकारें गर्जताती ॥ १२० ॥ स्वर्गीं हर्षित सुरगण । वेगीं जातसे वायुनंदन । आकाशमार्गें शोभायमान । क्षणें गमन दिगंता ॥ २१ ॥

हनुमंताला विलंब लागल्यानें श्रीरामांना चिंताः–

येरीकडे रघुनंदन । झाला अत्यंत उद्विग्न । सावध परी असावधपण । मार्गनिरीक्षण मांडिलें ॥ २२ ॥ कां पां न येचि कपिनंदन । कां लागलें विलंबन । न कळे कांहीं झालें विघ्न । राक्षसीं छळून मारिला ॥ २३ ॥ कीं सगळा पर्वतचि चुकला । आणखी पर्वतांतरासी गेला । कीं जातां मार्गचि भुलला । वेडावला कपींद्र ॥ २४ ॥ कीं नीट तेथेंचि गेला । पर्वतही ठाकिला । ओषधी नोळखेचि बहिलों । कीं डोळा लागला पर्वतीं ॥ २५ ॥ राक्षस कोणी निमले तेथ । तिहीं माया केली बहुत । गोंवून पाडिला आहे हनुमंत । कपिनाथ विटंबिला ॥२६॥ तो नभीं राक्षसांसी । नाकळे सर्वथा मायेसी । जिंतून माया राक्षसी । निजकार्यासी लाधेल ॥ २७ ॥ ओषधीतें राखत । गंधर्व असती तेथ । तिहीं देखिला कपिनाथ । ओषधी घेत पर्वतीं ॥ २८ ॥ तिहीं कळी मांडिली तेथें । घेवों न देती ओषधींतें । बळें मिसळोनि युद्धातें । तिहीं कपीतें गोंविलें ॥२९॥ हेंही न घडे कपीसीं । क्षणें मारील गंधर्वांसी । जगतीतळीं हनुमंतासीं । रणीं युद्धासीं

१ कौशल्यानें. २ वाट पाहणें.

३ पोंचला. ४ खरोखर.

न भिडवे ॥ १३० ॥ चौदा सहस्र वनकर । ऐशीं सहस्र किंकर । मारिला अखयाकुमर । अदट वीर हनुमंत ॥ ३१ ॥ अमित राक्षसांच्या पंक्ती । क्षणें मारिल्या मारुतीं । तेथें गंधर्व बापुडे किती । क्षणें कपिपति निवटील ॥ ३२ ॥ न कळे काय पडली गुंती । लोटोनि गेली मध्यराती । हनुमान न येचि शीघ्रगतीं । रघुपति सचिंत ॥ ३३ ॥ प्राणें वेंचल्या लक्ष्मण । ओषधीचें काय कारण । अश्रुपूर्ण झालें नयन । लक्ष्मण केंवी वांचेल ॥ ३४ ॥

हा वीर सुमहाबाहो प्रतिवाक्यं प्रयच्छ मे ।
न त्वमर्हसि सौमित्रे त्यक्तुं दुःखार्दितं हि माम् ३

अहा लक्ष्मणा काय केलें । रणीं युद्धातें सांडिलें । शक्तिभेदें शयन केलें । मज मोकलिलें संग्रामा ॥ ३५ ॥

त्वदीयाग्निसमुत्थेन शोकेनाहं विदाहितः ।
करोम्यराक्षसामुर्वी त्रैलोक्यं च दहाम्यहम् ॥४॥

करोनि अद्‌भुत पुरुषार्थ । वांचविला शरणागत । शक्ति केली प्रतिहत । शरणागत तुज आली ॥३६॥ शरणागता शरण । साच एक लक्ष्मण । ब्रीद दाविलें साच करून । शक्ति झेलून निजहृदयीं ॥ ३७ ॥ बिभीषण घातला पाठीसीं । शक्ति धरिली पोटेंसीं । सौमित्रें ख्याति केली ऐसी । शरणागतासीं शरण्य ॥ ३८ ॥ येरयेरांच्या घाता वहिलीं । येरयेरें प्रवर्तलीं । येरयेरांच्या भयें म्यालीं । दोनी आलीं तुज शरण ॥ ३९ ॥ बिभीषण पहिलें शरणार्थी । पाठीसीं घातला निश्चितीं । सर्वेचि शरण आली शक्ती । ते ठेविली त्वरित हृदयेंसीं ॥१४० ॥ प्राण जाईल सर्वथा । परी नुपेक्षावें शरणागता । सौमित्रें साच केलें आतां । प्राणांतव्यथा साहोनी ॥ ४१ ॥ बैसोनि लक्ष्मणाजवळी । हात पिटित वक्षःस्थळीं । सौमित्रें मांडिली रांडोळी[१] । मजसीं कां बोली बोलेना ॥ ४२ ॥ येरे येरे लक्ष्मणा । साद दे कां बंधुरत्ना । मज सांडिलें माजी रणा । निष्ठुर मना करोनी ॥ ४३ ॥ मज सांडोनि दुःखार्दित । रणीं निघालासि त्वरित । माझे अपराध बहुत । तुवां समस्त साहिले ॥ ४४ ॥ बहुसाल[१] कष्टलासी वनीं । कष्ट करिसी अनुदिनीं । पोट आपुलें बांधोनी । फळें आणोनी मज देसी ॥४५॥ चरण-क्षालन करिसी नित्य । चरण चुरिसी अहोरात्र । निद्रा न लगे अणुमात्र । सावचित्त रामभजनीं ॥ ४६ ॥ तुझे कष्ट आठवितां । मज होतसे दुःखा-वस्था । हृदयस्फोट होईल आतां । न देखतां सौमित्र ॥ ४७ ॥ म्हणऊनि घाली लोटांगणी । सर्वेचि सावध झाला मनीं । मी भ्रांत काय म्हणोनी । कंदनालागोनी उठिला ॥ ४८ ॥

श्रीरामांचा आवेश व क्रोधः— म्हणे काय झालें येथें । कवण नेईल सौमित्रातें । दमोनियां सकल भूतें । लोकपाळांतें दमीन ॥ ४९ ॥ पृथूनें दमियेली धरित्री । दुहिल्या ओषधी समग्री । मी त्याहून दमीन बाणाग्रीं । सौमित्र शरीरीं उठी जंव ॥ १५० ॥ अगस्तिऋषीनें निश्चितीं । शोषियेला अपांपती । मी त्याहून करीन ख्याती । त्रिजगती कोरडी ॥ ५१ ॥ सौमित्राची जीवनश्री । आणोनि देईल झडकरी । तंव करीन बोहेरी । बाणधारीं आपांची ॥ ५२ ॥ तेजें तेजेंचि शोषीन । जंव सतेज होय लक्ष्मण । अन्यथा महावात प्रेरीन । निःशेष शोषीन तेजासी ॥ ५३ ॥ बाणें महाशून्य भरडीन । प्राशीन सकळ प्रभंजन[३] । जंव लक्ष्मणाचा निजप्राण । स्वयें आपण आणून देई ॥५४॥ क्षोभवोनि चिदाकाश । घोटीन सगळेंचि आकाश । सौमित्राचें हृदयाकाश । सावकाश जंव होय ॥ ५५ ॥ दमोनियां सकळ देव । उडवीन त्यांची माव । करिती सौमित्रासी सावयव । तें लाघव करीन ॥५६॥ दमूनि दिशांची पोकळी । भरीन चिदानंद-कल्लोळीं । जंव सौमित्राचे कर्णबिळीं । आहाळ-

१ समुद्र. २ नाश.

३ वायु.

बाहळी निधे शब्द ॥५७॥ बाणें पाडोनियां सूर्यासी। खंडोनी उदयास्तांसी। घेईन हिरोनि तेजासी। नेत्रीं लक्ष्मणासीं भरीन ॥५८॥ अश्विनीदेव दोनी। निरोध केला आहे घ्राणीं। त्यांचा कंदचि खणोनी। सौमित्रघ्राणीं ओपीन ॥ ५९ ॥ वरुणातें गाळून घाणा। जेणें नीरस केली रसना। गोडी हिरोनि आणीन जाणा। चेतवीन सौमित्राची॥१६०॥ वायूनें मांडली घसघस। केला सौमित्र मंदस्पर्श। पिळोनि त्याचा प्राणांश। करीन सुस्पर्श सौमित्र ॥ ६१ ॥ इंद्रें मांडिलें बंड। निर्वीर्य केले बाहुदंड। ठेंचोनियां त्याचें तोंड। सबळ भुजदंड करीन ॥६२॥ यम संचरे अधोगती। क्षीण केली शरीरशक्ती। त्यासीं लावोनियां ख्याती। अक्षय निश्चितीं सौमित्र करीन ॥ ६३ ॥ ब्रह्मयानें केला निरोध। खुंटला रतिस्वानंद। त्याचा छेदोनियां बाध। अखंडानंद भरीन ॥६४॥ केली उपेंद्रें छळणोक्ती। खुंटली गमनागमनशक्ती। त्यासीं लावोनियां ख्याती। ऊर्मिलापती उठवीन ॥ ६५ ॥ बळीनें द्वारपाळ केला। वामन त्रिविक्रम भला। खिळीन सौमित्राच्या पाउला। चालवीन मग सुखें ॥ ६६ ॥ नभें मांडिलें द्वंद्व। निःशेष खुंटला शब्द। उडवून त्याचा शून्यवाद। अनाहतशब्द[1] काढीन॥६७॥ चंद्र पीडिला क्षयरोगें। तरी निश्चळ न राहे उगें। सौमित्राचें मन नेलें वेगें। मूर्च्छित करोनि राहिला ॥ ६८ ॥ ऐसें दंडीन मी त्यासी। स्वयें विसरोनि निजधर्मासी। सांडून संकल्पविकल्पांसी। उठवीन सौमित्रासी निर्विकल्प ॥ ६९ ॥ ब्रह्मयानें बुद्धि केली मंद। उडवीन त्याचें ब्रह्मपद। सौमित्रासीं निर्विकल्प शुद्ध। स्वरूपावबोध जंव करी ॥ १७० ॥ रुद्रें अहंकार केला क्षीण। त्यासीं सोहंमार करीन। संवर्तको[2] संहारून। धरी स्वरूपाभिमान जंव सौमित्र ॥७१॥ विष्णु येवोनियां त्वरित। न करी सौमित्रा सावचित्त। तरी तो करीन पदच्युत। सर्वगत देशधडी ॥ ७२ ॥ लक्ष्मणाचे विरहें जाण। पूर्ण क्षोभला रघुनंदन। अंतका अंतक होऊन। धनुष्यबाण सज्जिले ॥ ७३ ॥ मारीन राक्षस सकळ। जाळीन हें जगतीतळ। झाला क्रोधाग्निकल्लोळ। काळा काळ रघुवीर ॥ ७४ ॥

> एवमुक्त्वा महाबाहुः प्रगृहीतं च कार्मुकम्।
> ततः संत्रस्तमनसा वानरा भीमविक्रमाः ॥ ५ ॥
> किमेतदिति भाषंतः ससुग्रीवबिभीषणाः।
> प्राणिपत्याग्रतः स्थित्वा सर्वे प्रांजलयोऽब्रुवन् ॥६॥
> एकस्यार्थे महाबाहो त्रैलोक्यं हंतुमिच्छसि ॥ ७ ॥

रामाच्या क्रोधानें लोकपाळ सचिंत व रामाचा अनुभवः— अकाळ मांडला युगांत। लोकपाळ हडबडित। राम होतां क्रोधान्वित। डोळे झांकी प्रळयरुद्र ॥ ७५ ॥ ब्रह्मा म्हणे काय जालें। काळेंवीण प्रळयांत मांडिले। दुणे कष्ट मज ओढवले। पुन्हां कैसें सकळ ब्रह्मांड रचूं ॥ ७६ ॥ होतां सकळां आडदरा[3]। पळती मर्कटें सैरा। तें देखोनि थोरथोर। वानरवीर पुढें झाले ॥ ७७ ॥ नळनीळादि जांबवंत। अंगद सुग्रीव कपिनाथ। बिभीषण शरणागत। श्रीरघुनाथ प्रार्थिती ॥ ७८ ॥ पूर्णावतार रामरावो। अकाळीं करूं नये प्रळयो। कांपतसे ब्रह्मदेवो। नवी सृष्टी पहाहो करवेना ॥ ७९ ॥ अकाळ प्रळयो करितां। बोल लागेल निजव्रता। तूं सकळांतें पाळिता। निरपराधें घातां नये करूं ॥ १८० ॥ एकाचे अपराधासाठीं। संहारणें सकळ सृष्टी। ते प्रतिपालनाची गोष्टी। केंवी जगजेठी बोलावी ॥ ८१ ॥ तूं जनक सकळांचा। पिता पितामहाचा। निरपराध निजबाळांचा। संहार कैसा करितोसी ॥ ८२ ॥ म्हणोनि धरिले दोनी चरण। नको प्रयोजूं गुणीं बाण। तूं कृपाळु रघुनंदन। क्रोधोपशमन करीं रामा ॥ ८३ ॥ भक्तजनांचा कृपाळ। श्रीराम दीनदयाळ। बोळला कृपाकल्लोळ। प्रणतपाळ

१ आघातावांचून झालेला नित्यशब्द. २ प्रलयकर्त्याला. ३ दुप्पट. ४ भीति.

श्रीराम ॥ ८४ ॥ तृषार्त दीन चातक । देखतांचि एकाएक । वर्षोनियां कृपापीयूख । निववीले देख दयाळुत्वें ॥ ८५ ॥ निजभक्तांचें वचन । नुल्लंघीत रघुनंदन । केलें क्रोधाचें उपशमन । भक्तावगणन न करीच ॥ ८६ ॥ एका एकपणाची दिठी । एका जनार्दनीं नाथिली गोष्टी । घालितां श्रीरामीं मिठी । ब्रह्मत्वें सृष्टी हेलावे ॥ ८७ ॥ एका जनार्दना शरण । प्रार्थूनियां रघुनंदन । केलें क्रोधाचें उपशमन । निजजनकृपाळु ॥१८८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रघुनाथक्रोधोपशमनं नाम अष्टचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४८ ॥ ओंव्या ॥ १८८ ॥ श्लोक ॥ ७ ॥ एवं ॥ १९५ ॥

---

# अध्याय एकूणपन्नासावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## लक्ष्मण शुद्धीवर आला

श्रीराम शांत होतात :– श्रीरामा प्रार्थितां वानरगण । शरणागत बिभीषण । सृष्टिघाता कळवळोन । केलें उपशमन क्रोधाचें ॥ १ ॥ शांत करोनि कोपासी । आविष्टोनि मोहावेशीं । काय बोलत सुग्रीवासी । सावकाशीं परियेसा ॥ २ ॥

प्रशांतिमगमत्कोपो राघवस्य महात्मनः ।
भूयः शोकसमाविष्टो रामो दशरथात्मजः ॥ १ ॥
अब्रवीद्राघवो दीनः सुग्रीवं वानरेश्वरम् ।
सुग्रीव गच्छ किष्किंधां सहवानरसेनया ॥ २ ॥
कृतं मित्रसहायं तु यदन्यैर्भुवि दुष्करम् ।
अहं चाद्य महाबाहो यत्करिष्यामि तच्छृणु ॥ ३ ॥

श्रीरामांची सुग्रीवाकडे निर्वाणीची भाषा :– पुढें घेवोनि लक्ष्मण । सुग्रीवातें बोलावोन । अदीन परी दीनवचन । दशरथनंदन बोलत ॥ ३ ॥ सुग्रीवा परीस विनंती । तूं अवंचक मित्रकार्यार्थी । तुझे उपकार किती । म्यां वचनोक्तीं बोलावे ॥ ४ ॥ मज न बोलावे सर्वथा । काय तोंड दावूं समस्तां । कुढावीन शरणागता । वचन वृथा वल्गलों ॥ ५ ॥ माझें अंतकाळींचें वचन । तुवां नुल्लंघावें आपण । सर्वे घेवोन वानरगण । किष्किंधे गमन करावें ॥ ६ ॥ बिभीषणही सर्वे न्यावा । सर्व प्रकारें संरक्षावा । रावण करोनियां मावा । घेईल जीवा याचिया ॥ ७ ॥ वृथा जल्पलों यासीं । संहारीन रावणासी । अभिषेकीन बिभीषणासी । निजगजरेंसीं अति वोजा ॥ ८ ॥ वृथा गेला तो पण । न मारवेचि रावण । न कुढावितां बिभीषण । प्राणें लक्ष्मण वेंचला ॥ ९ ॥ सौमित्राचे निजबळें । छेदीन रावणाचें शिसाळें । तें अवघेंचि वृथा गेलें । रणीं मोकलिलें सौमित्रें ॥ १० ॥ रावण बापुडें किती । सौमित्रबळें त्रिजगती । नागवें मी रघुपती । ते शक्ति प्रतिहर्त झाली माझी ॥ ११ ॥ सौमित्र माझा निजप्राण । सौमित्र माझें जीवन । सौमित्रें मी सबळ जाण । त्रिभुवन आक्रमीं ॥ १२ ॥ सौमित्र माझी स्थिति गती । सौमित्र माझी धृति विरक्ती । सौमित्र माझी अढळ शांती । त्रिजगतीमाझारी ॥ १३ ॥ सौमित्र माझा निजावा । सौमित्र माझा विसांवा । सौमित्र माझा बोलावा । सौमित्रेंवीण जीवा जीवपण कैंचें ॥ १४ ॥ सौमित्रें मोकलितां येथ । कांहीं नाहीं मी रघुनाथ । जळो जळो हें जीवित । अति निंदित लौकिकीं ॥ १५ ॥ बिभीषणाचा ऋणी । मी झालों सकळ जनीं । उत्तर न बोलवे वचनीं । लाज मनीं वाटत ॥ १६ ॥ तुज असेल सामर्थ्य । तरी निवटोनि लंकानाथ । अभिषेकीं शरणागत । मज ऋणमुक्त तूं करीं ॥ १७ ॥

---

१ भक्तांचा अव्हेर. २ मिथ्या. ३ शिरून. ४ थोर.

५ निष्कपटी. ६ संरक्षण करीन. ७ शिर, मस्तक. ८ नष्ट नाहींशी. ९ आस.

इतुकेनि मी तुमचा । कृतोपकारी जन्माचा । ऋणी आहें सकळांचा । बहुत बाचा काय बोलूं ॥ १८ ॥ म्हणोनि घातलें लोटांगण । सुग्रीवा तुझे धरिले चरण । करावें किष्किंधागमन । बिभीषणसमवेत ॥ १९ ॥ कृपा करावी वानरांसीं । सुख द्यावें प्रजेसी । भोगीं स्त्रीपुत्रराज्यासी । शरणागतासी कुढावीं[1] ॥ २० ॥ सौमित्रावांचून जाण । माझे न वांचती प्राण । सौमित्र गेला मोकलून । उभ्यां उभ्यां प्राण सांडीन ॥ २१ ॥ चेतवूनि योगाग्नी । देह जाळीन तत्क्षणीं । लोकालोकीं झाडा घेऊनी । सौमित्रासी भेटेन ॥ २२ ॥ जेथें गेला लक्ष्मण । तेथें स्वयें जाईन । प्राण न राहती अर्ध क्षण । करीन गमन सांगातें ॥ २३ ॥ जेंवी शुष्क काष्ठ जळे । सर्वांग माझें तेंवी होरपळे । गात्रें विकळें[2] झाली सकळें । शरीर चळचळें कांपत ॥ २४ ॥

> एवमुक्तस्तु रामेण सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ।
> किमर्थं मुह्यसे देव त्वादृशो नैव मुह्यति ॥ ४ ॥

सुग्रीव म्हणे रघुनाथा । हें बोलणें न घडे सर्वथा । तुजवीण राज्य भोगितां । महादोष माथां वाजती ॥ २५ ॥ तुजवीण जें राज्य भोगणें । तें जेंवी अभक्ष्य भक्षणें । तुजवीण स्त्री सेवणें । मातृगमन तो दोष ॥ २६ ॥ तुजवीण जो विषयभोग । तो जाणावा क्षयरोग । कैंचा संसारस्वर्ग । नरकभोग भोगावा ॥ २७ ॥ तुजवीण भोगणें सुख । त्याहून मरण भलें देख । सांडून जातां रघुकुळटिळक । आकल्प नरक भोगावा ॥ २८ ॥ तुज सांडितां रघुपती । तेव्हांचि आम्हां क्षीण शक्ती । रावण येवोनि शीघ्रगती । घात निश्चितीं करील ॥ २९ ॥ मरावें जैं रावणहस्तें । तैं येथेंचि सांडूं देहातें । अनुसरल्या श्रीरामातें । कैंवी मागुतें परतावें ॥ ३० ॥ श्रीरामा ऐक सावधान । एकाएकीं निर्वाण । करूं नये गा आपण । तूं रघुनंदन विवेकी ॥ ३१ ॥ दृढ न विचारितां चित्तीं । निर्वाण न करावें निश्चितीं । गेला आहे मारुती । तो कार्यसिद्धीप्रती साधील ॥ ३२ ॥ संधी लोटली तीन प्रहर । रात्र उरली एक प्रहर । आतां येईल कपींद्र । ओषधिभार घेऊनी ॥ ३३ ॥ हनुमान येथोनि गेला । समाचार देखोनि राहिला । तेणें विलंब लाविला । तो रिता वहिला परतेना ॥ ३४ ॥ कांहीं पडली असेल गुंती । क्षणें उठवील मारुती । अतुळ तयाची शक्ती । त्रिजगतीं नाटोपे ॥ ३५ ॥ अदट[3] दाडुगा महावीर । मुखीं रामनाम निरंतर । त्या कोण अर्थ दुस्तर । कार्य सत्वर[4] साधील ॥ ३६ ॥ ब्रह्मादिकां दुर्धर शक्ती । तो रिता परतेल मारुती । ऐसें न मानावें रघुपती । शीघ्रगतीं येईल ॥ ३७ ॥

> इति तेषां ब्रुवाणानां हनूमान्मारुतात्मजः ।
> प्रदीप्त इव शैलेंद्रो गगने समदृश्यत ॥ ५ ॥
> किमेतदिति संभ्रांताः कपयो जातविस्मयाः ॥ ६ ॥

उत्तरदिशेकडून हनुमंताची चाहूलः— तंव उत्तरेच्या दिशाभागीं । जैसी धगधगीत आगी । दिसताहे लागवेगीं । येत स्वमार्गीं देखियेला ॥ ३८ ॥ आधींच हनुमान ढिसाळ । पुच्छीं पर्वत सबळ । देखोनियां वानरपाळ । एक सहेळ पळाले ॥ ३९ ॥ एकीं लंघिलीं गिरिकंदरें । एकीं पर्वतशिखरें । एकीं समुद्राचीं तीरें । वेगवत्तर पळाले ॥ ४० ॥ एक रिघाले कपाटीं[5] । एक रिघाले दिक्पुटीं । एकीं झाडां घातली मिठी । एक संकटीं पडियेले ॥ ४१ ॥ एक भरले दशदिशां । एकांचा दाटला घसा । एकां बोलवेना सहसा । एकीं धिंवसा[6] सांडिला ॥ ४२ ॥ एक सरसावले युद्धासीं । एक वृक्षातें हातवसी[7] । एक घेवोनि पर्वतासी । संमुख रणासीं चालिले ॥ ४३ ॥ एकीं वळियेल्या मुष्टी । दांत खाती करकराटीं । एकीं वळली पुच्छाटी । भ्यासुर दृष्टीं देखोनी ॥ ४४ ॥

१ संरक्षण कर. २ शिथिल. ३ मोठा. ४ सत्वर, तावडतोब. ५ पर्वतदरींत. ६ धैर्य. ७ हात घाली.

आगच्छंतं प्रधावंति ऊर्ध्वपुच्छा इतस्ततः ।
मायावी राक्षसः कोऽयमस्मान्हंतुमुपागतः ॥७॥
इति तत्संभ्रमं दृष्ट्वा रामः सुग्रीवमब्रवीत् ।
वानराधिप मा भैषीरियं रक्षोबिभीषिका ॥ ८ ॥
निर्भीर्भव महाबाहो निहन्म्येनं पतत्रिभिः ॥ ९ ॥

हनुमंताचें आगमनः—वानर महाभयभीत । इतस्ततां[१] पळत । अंतरिक्षीं काय दिसत । झाले विस्मित सकळिक ॥ ४५ ॥ देखोनि कपींचा आकांत । क्रोधें झाला क्रोधान्वित । चाप करोनि सज्जित । काय बोलत रघुवीर ॥ ४६ ॥ सुग्रीव आणि बिभीषण । अंगदादि वानरगण । स्वस्थ करोनि अंतःकरण । माझें वचन परिसावें ॥ ४७ ॥ भेणें पळती वानरगण । त्यासी द्यावें अभयदान । मायावी राक्षस दारुण । येतो धांवोन आकाशीं ॥ ४८ ॥ रूप धरोनि ढिसाळ । जैसा दिसे अग्निकल्लोळ । मारूं आला गोळांगूळ । रूपें विशाळ भासत ॥ ४९ ॥ भेडसावीतसे सर्वांसी । पळवीतसे वानरांसीं । बाणीं निवटीन मी यासी । निमेषार्धेंसीं सत्वर ॥ ५० ॥ क्षोभोनियां श्रीरामचंद्र । करावा जंव संहार । चापीं साज्जितां शर । तंव कपींद्र ओळखिला ॥ ५१ ॥ सवें बाण पुच्छीं डोंगर । जैसा दिसे कालाग्निरुद्र । रूप धरोनि भयंकर । तेथें सत्वर पावला ॥ ५२ ॥

एतस्मिन्नंतरे वीरः सोऽवतीर्य नभस्तलात् ।
निक्षिप्य पर्वतं भूमौ नानारत्नविभूषितम् ॥१०॥
विनीतः प्रांजलिर्भूत्वा राघवं वाक्यमब्रवीत् ।
विज्ञप्तिः श्रूयतां देव ससुग्रीवबिभीषण ॥ ११ ॥
ओषधिं नाधिगच्छामि विदित्वापि नरेश्वर ।
व्यतिक्रममवेहि त्वं क्षंतुमर्हसि सुव्रत ॥ १२ ॥
बहुविघ्नाश्च तत्रासन्येनाहं च विलंबितः ॥ १३ ॥

हनुमंताचें वृत्तांतकथन व क्षमायाचना :—सैन्याचे मेळीकारीं । गिरि ठेवोनि पृथ्वीवरी । नमाया कपिकेसरी । वानरभारीं चालिला ॥ ५३ ॥ क्षेमें सांगावें भरतासी । उठवीन या सौमित्रासी । निर्दळून रावणासी । अयोध्येसीं शीघ्र येऊं ॥५४॥ आज्ञापित भरतबाण । बाणें करोनियां नमन । गगना उसळला जाण । अर्ध क्षण न लागतां ॥ ५५ ॥ बोळवितां भरतबाणासी । बाण उसळला गगनासीं । विजु तळपे आकाशीं । तेणें वेगेंसीं चालिला ॥ ५६ ॥ लखलखीत डोंगर । जैसा दिसे रत्नाकर । ठेवोनि मेळीकारीं सत्वर । दर्शना कपींद्र चालिला ॥ ५७ ॥ लोटांगण श्रीरामचरणां । पुढती पुढती करी नमना । नमन सुग्रीवा बिभीषणा । अंगदही जाणा नमियेला ॥ ५८ ॥ नळ नीळ जांबवंत । नमिले जुत्पति समस्त । होवोनि अति विनीत । काय बोलत कपींद्र ॥ ५९ ॥ मज विलंब लागला तेथ । विघ्नें उठलीं बहुत । ओषधी आच्छादी पर्वत । वेडा निश्चित लाविलें ॥ ६० ॥ शक्ति झाली प्रतिहत । कांहींच नाठवे मत । बहुत चुकुर जालों तेथ । मग रघुनाथ स्मरियेला ॥ ६१ ॥ अंतरात्मा श्रीरामचंद्र । बुद्धि दिधली खडतर । समूळ उपडोनि डोंगर । मग सत्वर चालिलों ॥ ६२ ॥ मार्गीं येतां सत्वर । आश्चर्य वर्तलें थोर । बाण पातला वेगवत्तर । अति सुंदर नामांकित ॥ ६३ ॥ बाणीं रामनाम देखतां । अति विस्मय झाला चित्ता । नामीं अनुसरोनि तत्त्वतां । गेलों रघुनाथा बाणसंगें ॥ ६४ ॥ मी अविवेकी पालेखाइर । मर्कट नेणें विचार । भुलविलें अंतर[३] । गेलों सत्वर बाणासंगें ॥ ६५ ॥ नामीं चित्त वेधलें पाहीं । निजकार्याचा आठव नाहीं । पुढें अपूर्व देखिलें कांहीं । तें तुझे पायीं निवेदूं ॥ ६६ ॥ बाणासवें पर्वतासहित । आलों नंदिग्रामा त्वरित । देखिला बंधु भरत । जैसा मूर्तिमंत श्रीराम ॥६७॥ रामभ्रमें भ्रमलें माझें चित्त । क्रोधावेश आला तेथ । सौमित्र सांडोनि त्वरित । येथें रघुनाथ कां आला ॥६८॥ अविचारी मी वानर । बोल बोलिलों खडतर । अति तिखट वाग्वज्र । तें रघुवीर

१ इकडेतिकडे. २ खुशाली.

३ अंतःकरण.

क्षमा करूं ॥ ६९ ॥ भरतप्रेमा अद्भुत । प्रेमें लोभलेंसे चित्त । देह गेह न सांभाळित । प्रेमें डुल्लत सर्वदा ॥ ७० ॥ धन्य भरताचें जीवित । धन्य भरताचें आचरित । धन्य भरताचें व्रत । राम सेवित सर्वदा ॥ ७१ ॥ धन्य भरताचें जीवन । धन्य भरताचें भजन । धन्य भरताचें ज्ञान । राम चिद्घन सेवी सर्वदा ॥७२ । धन्य भरताचा भावार्थ । धन्य भरताचा इत्यर्थ । धन्य भरताचा सिद्धार्थ । श्रीरघुनाथ सर्व कर्मीं ॥ ७३ ॥ धन्य भरताचें कुळ । धन्य भरताचें शीळ । धन्य सूर्यवंश-माळ । अविकळ रामभजनीं ॥ ७४ ॥ भरत रामप्रेमा लोभला । भरत रामें कोंदला । भरत श्रीरामें धाला । सबाह्य भरला श्रीराम ॥ ७५ ॥ भरत देखोनि राघवा । मन लोभलें भरतभावा । भरतें गिळिलों आघवा । देहभावा विसरलों ॥७६॥ देखतां भरतप्रेम गहन । नेत्रांची वृत्ति झाली क्षीण । देखणेपणें भरतें जाण । माझे नयन व्यापिले ॥ ७७ ॥ ऐकतां भरतकथानिरूपण । श्रवणीं कोंदले श्रवण । नभ झालें शब्दायमान । अनाहत गहन लागलें ॥ ७८ ॥ चाखतां भरतप्रेमगोडी । रसना रसातें ओसंडी । अद्वैतचवी धडफुडी । सप्रेम आवडी भरताची ॥ ७९ ॥ घेतां भरतभजन-गंध । घ्राण विसरे गंधावबोध[२] । घ्राणीं कोंदला परमानंद । प्रेममकरंद भरताचा ॥ ८० ॥ अवचट भरतसंगीं । वायु लागतां अंगीं । अंगत्व विसरलों निजांगीं । स्पर्शतां आंगीं प्रेमें वायु ॥ ८१ ॥ भरतप्रेम मनीं भरलें । संकल्पविकल्पा मुकलें । चंचलत्व हारपलें । निश्चळ झालें प्रेमभावें ॥ ८२ ॥ नाठवे देहगेहभान । नाठवे कार्याची आठवण । नाठवे भरता भरतपण । मज कपीसीं कपिपण नाठवे ॥ ८३ ॥ भरतें आकर्षिली वृत्ती । मावळली उभयस्फूर्ती । कैंचा राम कैंचा मारुती । ऊर्मिलापति स्मरे कोण ॥ ८४ ॥ ऐसा गोंविलों सर्वशक्ती । मर्कट नेणें कार्यस्थिती । उशीर लागला रघुपती । क्षमा निश्चितीं मज करणें ॥ ८५ ॥

भरतप्रेमामुळें श्रीरामांची तन्मयता :—म्हणोनि घातलें लोटांगण । सुदृढ माथां धरिले चरण । मज क्षमा करो रघुनंदन । अविवेकी हीन मर्कट ॥८६॥ ऐकतां कपीचें वचन । तटस्थ झाला रघुनंदन । रामीं नाठवे रामपण । भरत संपूर्ण कोंदला ।.८७॥ प्रेमें भुलला रघुनाथ । पुढें देखे भरत । उठोनि आलिंगूं धांवत । प्रेम अद्भुत भरताचें ॥ ८८ ॥ मजलागीं कष्टलासी । व्रतें तपें सायासीं । उग्रकर्में आचरलासी । उपवासी मजलागीं ॥ ८९ ॥ उठीं दोघे करूं भोजन । सुंदर षड्रसें राजान्न । सांडीं हें वल्कलाभरण । करीं परिधान दिव्य वस्त्रें ॥९०॥ करीं अभ्यंगमज्जन । सोडीं जटांचें बंधन । रत्न-खचित मुकुटाभरण । सुंदर भूषण अंगीकारीं ॥ ९१॥ भरतभावें कपीसी । राम आलिंगी हृदयेंसीं । देखतां अंगदसुग्रीवांसी । प्रेम उत्कर्षीं न संटे ॥ ९२ ॥ उत्पत्ति सकळ वानरगण । अवघे झाले मूर्च्छापन्न । भरतप्रेम अति गहन । रघुनंदन भुल-विला ॥ ९३ ॥ सकळां टकमक झाली । शब्दासीं कुलुपें पडलीं । भरतप्रेमें उलथलीं । समाधि लागली सर्वांसी ॥ ९४ ॥ बिभीषण शरणागत । श्रीरामभजनीं सावचित्त । सत्त्वावस्था गिळोनि तेथ । काय बोलत रामासी ॥ ९५ ॥ श्रीरामा पाहें सावधान । विसरोनियां रामायण । आलिंगिला कपिनंदन । कार्या आठवण तुज नाहीं ॥ ९६ ॥ भरतप्रेमें भुललासी । भरत म्हणोनि कपीसी । आलिंगोनि राहिलासी । निजकार्यासी विसरोनी ॥९७॥ बिभीषणाचें वचन । ऐकोनि हनुमान जाण । स्वयें झाला सावधान । रघुनंदना विनवितो ॥९८॥ स्वामी ऐकें रघुनंदन । भरत नव्हें हनुमान जाण । आलों पर्वत घेऊन । ओषधि गहन जेथें असती ॥९९॥ वेडी जाती प्रेमाची । वेळ नेणें कार्याची ।

---

१ तत्पर, रत. २ सुगंधाचें ज्ञान.

३ दोघांची आठवण.

गोष्टी सांगितली भरताची । तेणें श्रीरामचि भूलला ॥ १०० ॥ शक्तिभेदें सौमित्र जाण । पडिलासे विसंज्ञ । यासी करावें सावधान । रावणकंदन करावया ॥ १ ॥ मर्कट पालेखाईर । नेणें कार्य-कार्यांतर । बहुत लाविलासे उशीर । क्षमा रघुवीर मज करो ॥ २ ॥ ऐसें बोलोनि हनुमंत । चरणां लागला त्वरित । सावध होवोनी रघुनाथ । काय बोलत कपीसी ॥ ३ ॥

हनूमंतो वचः श्रुत्वा रामो वचनमब्रवीत् ।
साधु वीर महाबाहो यस्य चेदृक्पराक्रमः ॥ १४ ॥

ऐकतां भरतगोष्टी । प्रेम उथळलें पोटीं । कांहीं न देखों दृष्टीं । तुजचि मिठी घातली ॥ ४ ॥ हा भरतप्रेमें भुलला । मी म्हणें भरतचि आला । म्हणोनि कपि आलिंगिला । भला चेवविला हनुमंतें ॥५॥ ब्रह्मादिकां न करवती । ऐसीं कर्में निश्चितीं । तुवां साधिलीं मारुती । निमेषगती न लागतां ॥६॥ तुझ्या उपकारा तत्त्वतां । मी ऋणी झालों कपिनाथा । वाचा खुंटली सर्वथा । कांहीं तत्त्वतां न बोलवे ॥७॥ तुझ्या कर्माची कथा । काय सांगों हनुमंता । सीता-शुद्धीची कथा । ऐकतां चित्ता चळकांप ॥८॥ इंद्र-जितवधालागीं सांग । तुवां ओढविलें सर्वांग । ते गोष्टी ऐकतां सवेग । होती उद्वेग चित्तासीं ॥ ९ ॥ एकएका उपकारा उत्तीर्ण । जीवें न होइजे कपि-नंदन । सर्वस्वेंसीं आपण । ऋणी संपूर्ण मी तुझा ॥११०॥ कांहीं न बोलवे सर्वथा । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । येरें वारोनि तत्त्वतां । चरण रघुनाथाचे वंदिले ॥ ११ ॥ राम मारुतिवृत्तांत । देखतां झाला विस्मित । सुषेण वैद्यराज तेथ । त्यासी बोलत सुग्रीव ॥ १२ ॥

सुषेण औषधी आणतोः-हे दोघेही प्रेमवोधले । निजकार्यातें विसरले । आपण जावोनि वहिले । ओषधिभार शोधावे ॥१३॥ विशल्य होय लक्ष्मणा । तें कार्य साधीं सुषेणा । म्हणोनि लागला चरणां । कार्यसाधना साधावें ॥ १४ ॥ ऐकोनि सुग्रीव-उत्तर । सुषेण निघाला सत्वर । सकळ वानरांचा भार । पर्वतशिखर वळंघले ॥ १५ ॥

सुग्रीवस्य वचः श्रुत्वा सुषेणोऽन्ये च वानराः ।
गिरिमारुह्य तं रम्यं नानाधातुविभूषितम् ॥१५॥

सर्वे वानरांचा भार । सुषेण वैद्यराज सत्वर । वळंघले पर्वतशिखर । ओषधिभार शोधावया ॥१६॥ अति दीर्घ पर्वतशिखरें । रमणीय गिरिकंदरें । जळें पूर्ण सरोवरें । कमळें मनोहर शोभती ॥ १७ ॥ अगराचीं झाडें बहुत । चंदनडोंगर बहकत । पुन्नाग चांफे पारिजात । पर्वतीं बहुत पुष्पजाती ॥ १८ ॥ सरोवरीं कर्णिकारें । सेविती निरंतर चक्रारें । पक्षिकुळें विचित्रें । चौफेर किलकिलती ॥ १९ ॥ अति रम्य पर्वत । वानरें सैरां हिंडत । सुषेण वैद्यराज तेथ । ओषधि शोधित अति वेगें ॥१२०॥ स्मरोनियां रघुनंदन । पर्वत पाहतां सावधान । झालें ओषधीचें दर्शन । वैद्य सुषेण हरिखत ॥ २१ ॥

तामोषधिं गृहीत्वासौ ह्यवतीर्य महीतले ।
शिलायां पेषयित्वा तु नस्यं तस्मै प्रयोजयत् ॥१६
महौषध्याः प्रभावेण लक्ष्मणः परवीरहा ।
विशल्यो नीरुजश्चैव उत्थितः स महीतलात् ॥१७

रामनामें सत्वर । उपटोनि ओषधिसंभार । करीत नामाचा गजर । वानरभार चालिला ॥२२॥ उतरोनि पृथ्वीतळीं । ओषधि चूर्ण केल्या शिळीं । रस घेवोनि तत्काळीं । शक्तिबिळीं ओतला ॥२३॥ रस घालितां सत्वर । सावध नव्हेचि सौमित्र । सुषेण झाला चिंतातुर । कांहीं विचार स्फुरेना ॥ २४ ॥ ब्रह्मादिकां अनुल्लंघ्य पूर्ण । एवढा प्रयत्न केला दारुण । शेखीं सावध लक्ष्मण । अद्यापि जाण होईना ॥ २५ ॥ सुग्रीवादेखतां । स्वामी रघुनाथ ऐकतां । वलगलों मी इतस्ततां । सौमित्रातें उठवीन

---

१ उत्पन्न झालें. २ शुद्धीवर आणला. ३ मुक्त.

४ चढले. ५ सुवासानें भरलेले.

॥ २६ ॥ ऐसें बोलबोलून । पाठविला वायुनंदन । महाविघ्नें जिणोन । पर्वताचि जाण आणिला ॥ २७ ॥ ओषधिसंभार सगळा । अंगें पिळोनियां वहिला । घायीं रस ओतिला । तो वृथा झाला प्रयत्न ॥ २८ ॥

औषधींचा प्रभाव न पडल्यानें सुषेणाचा गोंधळ :– तरी वैद्यक लटिकें झालें । शास्त्र वृथा रचिलें । शिष्टाचारा दूषण आलें । काय झालें मज न कळे ॥ २९ ॥ नाहीं रसायन चुकलें । धातूसीं अंतर नाहीं पडिलें । नाहीं अनुपान चुकलें । नाहीं सांडिलें क्रियेसी ॥ १३० ॥ काय झालें तत्त्वता । मज न कळे सर्वथा । धांव पाव गा रघुनाथा । शास्त्रसंमता संरक्षीं ॥ ३१ ॥ तंव आवेशें वायुनंदनी । जो भक्तांमाजीं चूडामणी । बोलता जाला हांसोनी । सुषेणा लक्षोनी अनुवादे ॥ ३२ ॥ सुषेणा चुकलासी मत्त । ज्याचेनि शास्त्रांसीं शास्त्रार्थ । जो वेदीं वेदार्थ । शिष्ट सनाथ ज्याचेनि ॥ ३३ ॥ जेणें चिकित्सा पाहाळी गेली । जेणें शास्त्रें बुझाविलीं । पुराणें वर्तों लागलीं । ज्याची चाली जाणोनी ॥ ३४ ॥ त्या विसरोनी रघुनाथा । स्वबुद्धी वैद्यक करितां । शीण पावलासी वृथा । स्वकार्यहीं न साधेचि ॥ ३५ ॥ उगवतां दिनमणी । हरपे तत्काळ रजनी । नक्षत्रेंसह चंद्र गगनीं । ठाकती होवोनी खद्योत[१] ॥ ३६ ॥ तेंवीं देखतां रघुनाथ । ओषधिभार समस्त । शक्ति झाली प्रतिहत । तुझें तेथ काय चाले ॥ ३७ ॥

श्रीराम-चरणतीर्थ देण्याची हनुमंताची प्रार्थनाः– ऐसें न करावें आपण । प्रार्थोनियां रघुनंदन । घ्यावें चरणतीर्थ मागोन । वांचेल लक्ष्मण तें करीं ॥३८॥ ओषधिरसामाजी देख । वेगीं घालोनि चरणोदक । रस देतां एकाएक । सकळ दुःख निरसेल ॥ ३९ ॥ कोणासी न कळे जनीं । नाम अमृतसंजीविनी । तो प्रत्यक्ष असतां अनुदिनीं[३] । निजाभिमानीं कष्टती ॥ १४० ॥ आम्हीं वैद्य चिकित्सक । क्षणमात्रें प्रतीति ते देख । दावूं लागतांचि निमेख[४] । तेणेंचि देख नाडिले ॥ ४१ ॥ 'सिद्धासीं सिद्धिलाभ होतां । अभिमान उठला अवचितां । तरी अत्यंचि गेलें तत्वतां । कष्ट वृथाचि सोसिले ॥४२॥ सर्व दुःखांच्या आपदा । प्राप्त झाल्या प्रल्हादा । नाम स्मरतां सर्वदा । दुःखबाधा छेदिली ॥ ४३ ॥ तो श्रीराम प्रत्यक्ष असतां । तुझा अभिमान झाला वृथा । चरणीं ठेवोनियां माथा । चरणतीर्था मागावें ॥ ४४ ॥ तीर्थासमवेत ओषधी । घायीं घालितां त्रिशुद्धी[५] । सौमित्र उठेल सत्वबुद्धी । युक्ति साधीं हे माझी ॥ ४५ ॥

श्रीरामचरणतीर्थानें लक्ष्मण सावध झालाः– ऐकोनि कपीचें वचन । संतोषला सुषेण । म्यां केला जो अभिमान । तो रघुनंदन क्षमा करो ॥४६॥ मर्कट नेणें मी सर्वथा । क्षमा करणें रघुनाथा । चरणीं ठेवोनियां माथां । चरणतीर्था घेतलें ॥ ४७ ॥ ओषधी तीर्थासमवेत । घायीं पिळितां समस्त । सौमित्र झाला सावचित्त । श्रीरघुनाथप्रसादें ॥ ४८ ॥ तीर्थे प्रोक्षितां शरीर[६] । सत्वर उठिला सौमित्र । बाप कृपाळु रघुवीर । वानरभार हरिखला ॥ ४९ ॥ रामनामें भुभुःकार । करीत उठिले वानर । नादें कोंदलें अंबर । चराचर दुमदुमिलें ॥ १५० ॥ नामें कोंदला भूगोळ । नामें व्यापिलें अंतराळ । नामें भेदलें पाताळ । ब्रह्मांडगोळ कोंदला ॥ ५१ ॥ नामें हर्षित झालें चित्त । स्वशरीर न सांभाळित । एक लोटांगण घालित । एक झेलित द्रुमवल्ली ॥ ५२ ॥ एक पर्वत झेलित । एक पर्वतीं बळंघत । येर येरां धके देत । येर टाकित येरावरी ॥ ५३ ॥ रामसंमुख बैसती एकें । तोंड करिती रडकें । सौमित्रें केलें नाहीं निकें[७] । मज सांडून देखें निघाला ॥ ५४ ॥ म्हणवोनि करीत रुदन । उपहासिती

१ विस्तारली. २ काजवे. ३ प्रतिदिवशीं. ४ क्षण. ५ खरोखर. ६ शिंपडतांच. ७ नेटकें, चांगलें.

रघुनंदन । हरिखें नाचती वानरगण । विस्मित मन रामाचें ॥ ५५ ॥ स्वयें उठोनी आपण । आलिंगिला लक्ष्मण । सुग्रीव अंगद बिभीषण । आनंदें पूर्ण कोंदले ॥ ५६ ॥ नवा लक्ष्मण उपजला । येणें मानें सुखावला । उत्साह ऐसा कोंदला । विसरला राम आपणा ॥ ५७ ॥ उचलोनियां लक्ष्मण । नाचों लागला रघुनंदन । एका जनार्दना शरण । निजजनकृपाळु ॥१५८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणोत्थापनं-नाम एकोनपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ४९ ॥ ओंव्या ॥ १५८ ॥ श्लोक ॥ १७ ॥ एवं ॥ १७५ ॥

---

## अध्याय पन्नासावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### हनुमंत पर्वत पूर्वस्थळीं ठेवतो

लक्ष्मणाचें श्रीरामांना आणि सर्वांनां वंदनः-

रामस्मरणें लक्ष्मण । सवेग उठोनियां जाण । नमियेला रघुनंदन । बिभीषण नमियेला ॥ १ ॥ नमस्कारिलें सुग्रीवासी । नमन केलें अंगदासी । नमन सकळ वानरांसी । सौमित्रें सकळांसी नमियेलें ॥ २ ॥

> साधु साध्विति सुप्रीतः सुषेणं प्रत्यपूजयत् ।
> उत्थितं भ्रातरं दृष्ट्वा रामो हर्षसमन्वितः ॥ १ ॥
> परिष्वज्य च सौमित्रिं सबाष्पस्वेदमब्रवीत् ॥ २ ॥

श्रीरामांना आनंदः-उठिला देखोनि लक्ष्मण । उल्लासे रघुनंदन । आलिंगोन सुषेण । काय आपण बोलता ॥३॥ तुझिया उपकारा उत्तीर्ण । सर्वथा न होईजे गा आपण । सौमित्रासी जीवदान । दाता तूं सुषेण झालासी ॥४॥ ऐसा विनवोनि सुषेण । आलिंगिला आपण । सर्वेचि धरोनि लक्ष्मण । हृदयीं जाण आलिंगी ॥ ५ ॥ कुरवाळितां अमृतहस्तीं । अंगीं घायव्रण न दिसती । अस्थि सांधल्या यथास्थितीं । श्रीरघुपति स्पर्शतां ॥ ६ ॥ करोनि ओषधींचें मिष । वांचविलें सौमित्रास । स्वसामर्थ्यें पूर्ण परेश । परी कोणास कळेना ॥ ७ ॥ घेवोनि मोहाची गुंथी[२] । बोलतसे सौमित्राप्रती । भेटलासी ऊर्मिलापती । त्रिजगतीं सभाग्य ॥ ८ ॥ तुझे आंगींचा घावो । देखतांचि महाबाहो । मज प्राणांत झाला पहाहो । आठवितां देहो पुरेना ॥ ९ ॥ निजरूप देखोनि लक्ष्मणा । अति सुख झालें रघुनंदना । पौर्णिमेचा चंद्र जाणा । जेंवी पूर्ण सोळा कळीं ॥ १० ॥

सुषेण व हनुमंताबद्दल श्रीरामांची कृतज्ञताः-

सुषेणा तूं महाचतुर । आणि हनुमान वीर कपींद्र । झाला दोघांचा कृतोपकार । बंधु सौमित्र मज दिधला ॥ ११ ॥ वांचविला लक्ष्मण । मी वांचलों रघुनंदन । वांचले भरतशत्रुघ्न । सीता चिद्रत्न वांचली ॥ १२ ॥ बिभीषण शरणागत । अंगद सुग्रीव वानरनाथ । तिघी माता निश्चित । जन समस्त अयोध्येचे ॥ १३ ॥ हनुमान आणि सुषेण । याचि रीतीं आपण । स्वव्रिता झाला लक्ष्मण । जीवदान तुम्हीं दिधलें ॥ १४ ॥

> एवमुक्त्वा तु सौमित्रिं राघवस्तं महायशाः ।
> परिष्वजत सौमित्रिं सुग्रीवः पवनात्मजः ॥ ३ ॥

हनुमंताचें रामांना उत्तरः-ऐसें बोलतां रघुनंदन । आणि बंधु लक्ष्मण । येरीं लागोनियां चरणां । दोघां जणां आलिंगिलें ॥ १५ ॥ ऐकें स्वामी रघुनाथा । झणें उपकार घेसी माथां । आम्हीं मशकें तत्त्वतां । महिमा सर्वथा तीर्थाचा ॥ १६ ॥ तुझें चरणतीर्थ न घेतां । प्रयत्नचि झाला वृथा । घेतां तुझ्या चरणतीर्था । सावधानता सौमित्रासीं ॥ १७ ॥ सामर्थ्य आपुलें लोपविसी । आणि उपकार माथां घेसी । महत्त्व वानरां देसी । निजमानसीं कृपाळु ॥१८॥

---

१ जखमा.

२ बुरखा.

# अध्याय पन्नासावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## हनुमंत पर्वत पूर्वस्थळी ठेवतो

लक्ष्मणाचे श्रीरामांना आणि सर्वांना वंदन : रामस्मरणें लक्ष्मण। सवेग उठोनियां जाण। नमियेला रघुनंदन। बिभीषण नमियेला ॥१॥ नमस्कारिलें सुग्रीवासी। नमन केलें अंगदासी। नमन सकळ वानरांसी। सौमित्रें सकळांसी नमियेलें ॥२॥

साधु साध्विति सुप्रीतः सुषेणं प्रत्यपूजयत्। उत्थितं भ्रातरं दृष्ट्वा रामो हर्षसमन्वितः ॥१॥
परिष्वज्य च सौमित्रिं सबाष्पस्वेदमब्रवीत् ॥२॥

श्रीरामांना आनंद : उठिला देखोनि लक्ष्मण। उल्लासे रघुनंदन। आलिंगोन सुषेण। काय आपण बोलत ॥३॥ तुझिया उपकारा उत्तीर्ण। सर्वथा न होईजे गा आपण। सौमित्रासी जीवदान। दाता तूं सुषेण झालासी ॥४॥ ऐसा विनवोनि सुषेण। आलिंगिला आपण। सर्वेचि धरोनि लक्ष्मण। हृदयीं जाण आलिंगी ॥५॥ कुरवाळितां अमृतहस्तीं। अंगी घायवण[1] न दिसती। अस्थि सांधल्या यथास्थितीं। श्रीरघुपति स्पर्शतां ॥६॥ करोनि ओषधींचें मिष। वांचविलें सौमित्रास। स्वसामर्थ्ये पूर्ण परेश। परी कोणास कळेना ॥७॥ घेवोनि मोहाची बुंथी[2]। बोलतसे सौमित्राप्रती। भेटलासी ऊर्मिलापती। त्रिजगतीं सभाग्य ॥८॥ तुझे आंगींचा घावो। देखतांचि महाबाहो। मज प्राणांत झाला पहाहो। आठवितां देहो पुरेना ॥९॥ निजरूप देखोनि लक्ष्मणा। अति सुख झालें रघुनंदना। पौर्णिमेचा चंद्र जाणा। जेंवी पूर्ण सोळा कळीं ॥१०॥

सुषेण व हनुमंताबद्दल श्रीरामांची कृतज्ञता : सुषेणा तूं महाचतुर। आणि हनुमान वीर कपींद्र। झाला दोघांचा कृतोपकार। बंधु सौमित्र मज दिधला ॥११॥ वांचविला लक्ष्मण। मी वांचलो रघुनंदन। वांचले भरतशत्रुघ्न। सीता चिद्रत्न वांचली ॥१२॥ बिभीषण शरणागत। अंगद सुग्रीव वानरनाथ। तिघी माता निश्चित। जन समस्त अयोध्येचे ॥१३॥ हनुमान आणि सुषेण। याचि रीती आपण। स्तविता झाला लक्ष्मण। जीवदान तुम्हीं दिधलें ॥१४॥

एवमुक्त्वा तु सौमित्रिं राघवस्तं महायशाः। परिष्वजत सौमित्रिं सुग्रीवः पवनात्मजः ॥३॥

हनुमंताचे रामांना उत्तर : ऐसें बोलतां रघुनंदन। आणि बंधु लक्ष्मण। येरीं लागोनियां चरणां। दोघां जणां आलिंगिलें ॥१५॥ ऐकें स्वामी रघुनाथा। झणें उपकार घेसी माथां। आम्हीं मशकें तत्त्वतां। महिमा सर्वथा तीर्थाचा ॥१६॥ तुझें चरणतीर्थ न घेतां। प्रयत्नचि झाला वृथा। घेतां तुझ्या चरणतीर्था। सावधानता सौमित्रासीं ॥१७॥ सामर्थ्य आपुलें लोपविसी। आणि उपकार माथां घेसी। महत्त्व वानरां देसी। निजमानसी कृपाळु ॥१८॥ लोपवोनि स्वसामर्थ्या। महत्त्व देणें निजभक्तां। हें साजे एका रघुनाथा। दीना अनाथा कळे केंवी ॥१९॥ ऐसें करोनियां स्तवन। घालोनियां लोटांगण। तंव सुग्रीव राजा आपण। रघुनंदना विनवीत ॥२०॥

सुग्रीवाची पर्वत पाहाण्याची इच्छा व रामाची आज्ञा : चरणीं ठेवोनियां माथां। विनवीतसे रघुनाथा। अपूर्व देखोनि पर्वता। वानरां समस्तां उल्लास ॥२१॥

अपूर्वं तं गिरिं दृष्ट्वा कौतुहलसमन्वितः। विज्ञापयति सुग्रीवो राघवं स च लक्ष्मणः ॥४॥
कौतूहलसमाविष्टाः पर्वतारोहणं प्रति। दत्तानुज्ञा राघवेण सुग्रीवेणांगदेन च ॥५॥

---

शब्दार्थ : १. जखमा, २. बुरखा.

पहावया पर्वतेंद्र[1]। वानरां आल्हाद थोर। आज्ञा देणें सत्वर। श्रीरामाचंद्रा कृपाळुवा ॥२२॥ ऐकोनि सुग्रीवाचें वचन। राम झाला हास्यवदन। तुझें आज्ञाउल्लंघन। शके कोण करावया ॥२३॥ पर्वतावरी सुखें जावें। शिखरें शिखर पहावें। फळ जळ स्वीकारावें। तृप्त करावें वानरां ॥२४॥ ऐसें रामें आज्ञापिलें। तंव सुग्रीवें मागुती विनविलें। देवें तेथें पाहिजे आलें। वचन मानिलें श्रीरामें ॥२५॥

तं समारुरुहुः शैलं नानारत्नोपशोभितम् ॥६॥

श्रीरामचंद्रासमवेत। वानर वळंघले पर्वत। नाना रत्नीं शोभत। जैसा दिसत रत्नाकर ॥२६॥ विचित्र धातु शोभत। विचित्र दिसे जळस्रोत[2]। विचित्र सरोवर तेथ। कमळें शोभत विचित्र ॥२७॥ विचित्र द्रुमवल्ली तेथ। विचित्र ओषधी अनंत। देखतां सौमित्र विस्मित। आश्चर्य मानित श्रीराम ॥२८॥

सुषेणाचे वनस्पतीच्या उत्पत्तींचे कथन : शोभा देखोनि पर्वतीं। सुग्रीव पुसे सुषेणाप्रती। दिव्यौषधी पर्वतीं। काय निमित्तीं राहिल्या ॥२९॥ साद्यंत हा वृत्तांत। सुषेणा सांगे इत्थंभूत। पुसता जाला वानरनाथ। ऐकोनि सांगत सुषेण ॥३०॥

सुषेणोऽभ्यवदत्तांस्तु पूर्ववृत्तानि सूचयन्। इह विष्णुश्च ब्रह्मा च शक्रोऽग्निर्वरुणो यमः ॥७॥
लोकपालाश्च भगवान्कुबेरः सह राक्षसैः। एतद्रम्यं महास्थानं यत्र देवाः समागताः ॥८॥
संप्रीतैश्चाप्सरोभिश्च ऋषिभिश्च महाव्रतैः। अत्र राहोः शिरश्छिन्नं विष्णुना प्रभाविष्णुना ॥९॥
जाता तत्रौषधिर्दिव्या विशल्यकरणी शुभा। इयं सा चेति दृष्ट्वा तां ददर्श परमौषधिम् ॥१०॥

ब्रह्मशाप इंद्रासी झाला। रत्नसमूह सागरीं पडला। म्हणोनि मंथनादर मांडिला। देवदैत्य मेळा मिळोनी ॥३१॥ लोकपाळ समस्त। यक्ष किन्नर समस्त। राक्षस पातले तेथ। ऋषि बहुत पाहूं आले ॥३२॥ देवांगना निजगजरीं। नृत्य करिती नानापरी। गंधर्व गाती सप्तस्वरीं। मंथन सागरीं पाहूं आले ॥३३॥ मंदर करोनियां रवी। वासुकी बीरडी[3] बरवी। पुच्छ धरियेलें देवीं। मुख दैत्यीं धरियेलें ॥३४॥ मंदराद्रि[4] जाईल रसातळा। म्हणोनि कूर्म तळीं राहिला। मंथनारंभ केला। अत्यादरेंकरोनि ॥३५॥ आरंभींच हालाहल। जाळीत जगतीतळ[5]। उठिलें तत्काळ लोक। सकळ तळमळती ॥३६॥ जाळितां सकळ जनांसी। मग प्रार्थिलें शंकरासी। तेणें गिळिलें विषासी। जाळी त्यासी अनिवार ॥३७॥ शिव झाला कासाविसी। तो स्मरे भगवंतासी। येतां रामनाम मुखासीं। झाली विषाची उपशांती ॥३८॥ पुढें मंथन आरंभिलें। रत्नांचे समूह निघाले। विभाग करूं आदरिलें। तेथें लागलें भांडण ॥३९॥ मद्य दिधलें दैत्यांसी। लक्ष्मीकौस्तुभ विष्णुसी। येर पाठवी स्वर्गासी। आला दैत्यांसीं अति क्रोध ॥४०॥ मंथन करितां कष्टलों आम्हीं। अमृत घेवोनि जाल तुम्ही। म्हणोनि उठिले संग्रामीं। रणभूमीं रणमारें ॥४१॥ सहज दैत्य बळवंत। वरी मद्यपानें उन्मत्त। युद्धा मिसळले अद्भुत। देवांचा घात करीतचि ॥४२॥ मंथन करितां श्रमले। देव क्षीणशक्ति झाले। दैत्य झोडीत उठिले। पळते झाले दश दिशा ॥४३॥ एक आरडती ओरडती। भेणें दश दिशा धांवती। धांव पाव गा श्रीपती। या आकांतीं संरक्षीं ॥४४॥ देखोनि देवांची करुणा। विष्णु कळवळिला मना। करिता झाला सूचना। दैत्य हननालागोनी ॥४५॥ रूपें जाहला तो मोहिनी। अति सुंदर त्रिभुवनीं। विश्व लाविलें ध्यानीं। दैत्य भुलवोनी मोहिले ॥४६॥ मिळोनि मोहिनीपासीं। वेढियेलें तियेसी। लागती वेळोवेळां पायांसी। तूं आम्हांसी अंगिकारीं ॥४७॥ ते न पाहे कोणाकडे। दैत्यसमूह देखोनि रडे। फुंदफुंदो पायां पडे। आम्हांकडे पाहें पां ॥४८॥ अंगीकारीं

---

शब्दार्थ : १. पर्वतश्रेष्ठ, द्रोणागिरी, २. जलप्रवाह, ३. दोरी, ४. मंदर, पर्वत. ५. पृथ्वीतळ.

आम्हांसी। करूं जें जें तूं सांगसी। नुल्लंघूं तुझिया वचनासी। घे भाकेसी[1] आमुच्या ॥४९॥ ऐकोनि दैत्यांचें वचन। मोहिनी बोलिली आपण। परस्परें काय म्हणोन। तुम्हां भांडण लागलें ॥५०॥ तो समूळ वृत्तांत। मज सांगावा साद्यंत। तुमचा कलह समस्त। मी त्वरित छेदीन ॥५१॥ ऐकतां तें वचन। अवघे गेले भुलोन। सांगते झाले आपण। अपूर्व कथन युद्धाचें ॥५२॥ मंथनीं निघालें अमृत। अवघें देव नेवों पाहत। म्हणोनि आम्ही भांडत। हिरोन अमृत घ्यावया ॥५३॥ देखोनियां तुझी मूर्ती। अति उल्हास झाला चित्तीं। जें सांगसी ते निश्चितीं। आम्हीं चित्तीं मानिलें ॥५४॥ नुल्लंघूं तुझे वचन। घे आमुचें भाष्य प्रमाण। तुझ्या वचनालागीं जाण। जीव प्राण वेंचूं पैं ॥५५॥ अनुसरलेती वचनासीं। तरी बुझावीन[2] दोघांसी। मद्यामृत समरसीं। उभय सेनेसी वाढीन ॥५६। वेगळालिया पंक्ती। उभयसेना बैसावी निगुती। गेलिया येर[3] येरा पंक्तीं। दंड निश्चितीं मी करीन ॥५७॥ वचन मानलें सकळां। पंक्ती बैसल्या दोही पाळां। घट मायाकृत निर्मिला। लोकां सकळां अलक्ष ॥५८॥ भीतरीं केला पडदरा। उभय रस ओतिले सैरां। दैत्यां वाढिली सुरा। अमृतधारा देवांसी ॥५९॥ दैत्य सेविती कठरा वृत्ती। येर गोडिया मिटक्या देती। राहु धूर्त जाणे चित्तीं। आला गुप्तगतीं देवांमाजी ॥६०॥ अमृत पडतां मुखांतरीं। चंद्रें दाविलें झडकरी। येरी सुदर्शन प्रेरी। कंठनाळ झडकरी छेदिलें ॥६१॥ चंद्रें दाखविले राहूसी। राहु झोंबला चंद्रासीं। अद्यापिवरी आकाशी। राहुपर्व पौर्णिमेसीं होत असे ॥६२॥ धड पडिले धरेवरी। वाढत निघालें धरित्रीं। मोहिनी बैसूनि उरावरी। वास करी नेवासीं ॥६३॥ धड पडोनियां तळीं। वाढियेलें महीतळीं। घनवट ऐसी आख्या झाली। तये काळीं तये देशीं ॥६४॥ शिर उसळलें गगना। तें ग्रहचक्रीं बैसोनि जाणा। लागे शशिसुभानां[4]। करी ग्रहणा वेळोवेळां ॥६५॥ अमृतें देव तुष्ट पुष्ट झाले। दैत्य मद्यमदें मातले। निजयुद्धातें मिसळले। देवीं मारिले क्षणमात्रें ॥६६॥ पूर्वविभागाचे स्थितीं। रत्नें नेमिली शीघ्रगतीं। राहूचें अमृत क्षितीं। मारितां निश्चितीं सांडलें ॥६७॥ तेथें ओषधिसंभार। होवोनि व्यापिला डोंगर। ऐकतां विस्मित सौमित्र। सुग्रीव वीर विस्मित ॥६८॥

**श्रीरामांच्या अनुज्ञेने वानरांकडून फळे भक्षण :** वानरवीर समस्त। सुग्रीवासी प्रार्थित। अमृतसंजीवनी येथ। फळें त्वरित भक्षावीं ॥६९॥ प्रार्थोनियां हनुमंता। आज्ञा पुसावी रघुनाथा। वानर श्रमले युद्ध करितां। त्यांसी तृप्त्यर्था आज्ञापीं ॥७०॥ सुग्रीवें प्रार्थिला हनुमंत। तेणें विनविला रघुनाथ। फळभोजनीं कपि समस्त। सोडी रघुनाथ सन्मानें ॥७१॥ पर्वताचें शिखर शिखर। वानर हिंडती सैर। वृक्ष आसुडिती सत्वर । फळसंभार भक्षिती ॥७२॥ सकाम हिवें पीडलीं एकें। क्रोधाग्नीनें जाळिलीं अनेकें। लोभवल्लीं गुंडाळलीं एकें। त्यांची वाढी देखे खुंटली ॥७३॥ सोहंसांदी एक पडलीं। एक तृष्णाजळीं बुडालीं। आशाघारीं जीं टोंचिलीं। तीं किवनलीं[5] झाडींचि ॥७४॥ विकल्पपक्षीं खादलीं एकें। अंतरत्वचे कोरलीं देखें। अभाववातें उडालीं एकें। आकल्प एकें भ्रमताती ॥७५॥ विषयझाडें झाडिलीं। कामिनीकुचकर्दमीं पडली। त्यांची निर्गति नव्हे वहिली। अधोद्वारा गेलीं अधोगती ॥७६॥ एकीं कर्मकांडीं पडलीं। तीं स्वर्गींचे दरडीं गुंतलीं। एकीं संधीं निष्टलीं। सर्वेचि पडलीं भगमुखीं ॥७७॥ ऐसिया फळांचिया जाती। वानर हातीं न शिवती। कृपा वोळला रघुपती। वानरपंक्ती विवेकी ॥७८॥ जीं स्नेहदेंठीचीं सुटलीं। वनिताहातींची निष्टलीं। जी शांतितेजें मुरालीं। जीं पिकलीं निर्विकार ॥७९॥ जीं निराशे मघमघिलीं। शांती दांती अरुवारलीं। सुखरूपें साकारलीं। फळें सेविलीं वानरीं ॥८०॥ निजात्मबोधें मघमघित। नित्यनैराश्य रस

शब्दार्थ : १. शपथ, वचन, २. समजावीन, ३. एक दुसऱ्या पंक्तीत गेल्यास ४. चंद्रसूर्यांना, ५. शतयुक्त झाली.

गळत। जेतें हंसशुक झेंपावत। तीं फळें सेवित वानर ॥८१॥ अहंकोहंसोहंविहीन। ब्रह्मी ब्रह्मत्व जेथें लीन। जेथें नाहीं मीतूंपण। ऐसी स्थिती पूर्ण सेविती ॥८२॥ बहुत दिवस आवरिले। श्रीरामें पर्वतीं सोडिले। नाना रस सेविते झाले। विटावूं[1] लागले सुरसिद्धां ॥८३॥ विचित्र फळें सेवित। विचित्र जळें प्राशित। श्रीरामप्रेमें डुल्लत। विसरत देहभाव ॥८४॥ हरिखें विटाविती देवांसी। वांकुल्या दाविती ऋषींसी। वेगीं भजा श्रीरामासी। अच्युतफळासी पावाल ॥८५॥ न भजतां श्रीरामचंद्रा। कदा न चुकती येराझारा। उकल[2] नव्हे संसारा। दुःखसमुद्रामाजी पडे ॥८६॥ नाना ओषधींचे रस। कपींनीं सेविले बहुवस। तृप्ति पावोनि मानस। अवघे तळास उतरले ॥८७॥

अथोवाच हनूमंतं रामः सुग्रीवसन्निधौ। पर्वतो नीयतां वीर मर्यादा चार्णवस्य तु ॥११॥
एवमुक्तस्तु हनुमान्कृतवेगो महकपिः। दौर्भ्यां समुह्य तं शैलं प्रयातुमुपचक्रमे ॥१२॥

श्रीरामांच्या आज्ञेने हनुमंत पर्वत परत नेतो : रामासमवेत सुग्रीव वीर। सकळ वानरांचा भार। उतरोनि पर्वतशिखर। काय रघुवीर बोलिला ॥८८॥ महावीरा हनुमंता। पर्वत नेईं मागुता। स्थापोनियां स्वस्थता। अति शीघ्रतां परतावें ॥८९॥ येथें ठेवितां पर्वत। शिष्टाचारा विरुद्ध होत। यालागीं नेवोनियां त्वरित। यथास्थित स्थापावा ॥९०॥ ब्रह्मयानें सृष्टि निर्मिली जैसी। आपण संरक्षावी तैसी। करूं जातां अनारिसी[3]। शिष्टाचारासीं मिळेना ॥९१॥ सागर नुल्लंघी वेळेसी। तेंवी आम्हीं ब्रह्मसृष्टीसी। प्रतिपाळावें अति यत्नेंसीं। मर्यादेसीं रक्षूनी ॥९२॥ ऐसें बोलतांचि रघुवीर। कपीनें केला नमस्कार। नामें करोनि भुभःकार। शैल सत्वर उचलिला ॥९३॥

दिशश्च विमलाः सर्वा जाताश्च हिमपांडुराः। हनुमंतं सविक्रांतमुत्पत्य गगने स्थितम् ॥१३॥

धरोनियां दोहीं बाहीं। उचलिला लवलाहीं। श्रीराम स्मरोनि हृदयीं। गगनीं पाहीं उसळला ॥९४॥ जैसा श्रीरामाचा बाण। धनुर्ष्यींहूनि सुटतां गुण। गगनीं उसळेल संपूर्ण। रिपुदळण करिताचि ॥९५॥ मेळवोनि द्रव्य तीव्र। जेंवी सोडिजे अग्नियंत्र[4]। तेंवी उडाला कपींद्र। दुष्टसंहार करितचि ॥९६॥ तेजें उजळलें उखामंडळ[5]। झाला अरुणोदय तत्काळ। नयन झाले जी निर्मळ। गोळांगूळ देखिला ॥९७॥

राक्षसांचा आकांत व रावणाची तळमळ : राक्षसां झाला आकांत। तळमळी लंकानाथ। अनावर हा कपि समर्थ । नाहीं भीत कळिकाळा ॥९८॥ आम्हीं काळनेमि पाठविला। तोही तेणें मारिला। पर्वत घेवोनि आला। येणें उठविला सौमित्र ॥९९॥ सर्वेचि पर्वत मागुता। घेवोनि जातो आतां। धरा मारा काय पाहतां। हिरोनि पर्वता घ्या वेगीं ॥१००॥

अपश्यन्राक्षसाः सर्वे ब्रजंतं सागरोपरि। रावणस्त्वब्रवीद्दृष्ट्वा समीपस्थान्निशाचरान् ॥१४॥
हस्तिकर्णं शंकुकर्णं मेघचित्रं च रा[illegible]म्। एते चान्येऽपि बहव आज्ञाप्ता रावणेन तु ॥१५॥
स्थूलजंघं महानादं महावक्त्रं महोरसम्। उल्कामुखं महावीर्यं चतुर्वक्त्रं च राक्षसम् ॥१६॥
शीघ्रं मायाप्रभावेण हनूमान्गृह्यतामिति। यो निगृह्यानयेत्तूर्णं तस्य राज्यं ददाम्यहम् ॥१७॥

स्थूळजंघा सावधान। महानादा ऐकें वचन। महावक्त्रा तुवां आपर। कपिनंदन आणावा ॥१॥ महारेसा उल्कामुखा। महावीर्या चतुर्मुखा। हस्तिकर्णा सुरेखा। कपिनायका आणा वेगीं ॥२॥ शंकुकर्णा विचित्रा। महाविरा मेघचित्रा। सावधान माझिया उत्तरा। ऐका समग्र सुचित्त ॥३॥ पर्वतेंसहित कपींद्र। धरोनि आणील मजसमोर। त्यासी करीन राज्यधर। जैसा दशशिर तैसा तो ॥४॥ येथें आणिल्या पर्वत। राक्षस वांचती समस्त। घाय

शब्दार्थ : १. वाकुल्या दाखवू लागले, २. मुक्तता, ३. वेगळी, ४. तोफ, ५. पहाट, प्रभातकाळ.

कोणाही न बाधित। औषधि अद्‌भुत तेथें असती ।।५।। राज्यदानाचें उत्तर। ऐकतांचि सत्वर। उठावला राक्षसभार। वानरेंद्र धरावया ।।६।। मरण देखतांही दृष्टीं। उठावले कोट्यनुकोटी। धनलोभाची ममता मोठी। मरणांत कष्टी सोडीना ।।७।। उरीं आदळतां मरण। सर्वथा नव्हे उदासीन। मरेन कीं हें साधीन। प्रतिज्ञापण स्वयें करिती ।।८।। जो मनोरथ करों बैसे। तो सावध असतांचि पिसें। देह विसरोनि आपैसें। नाचों बैसे मनोरथीं ।।९।। राज्य देईन ऐसी गोष्टी। ऐकतांचि उठाउठीं। उठल्या कोटींच्या कोटी। मरणसन्निष्टीं सन्नद्ध ।।११०।।

श्रुत्वा तु राक्षसेन्द्रस्य वचस्ते त्वरयान्विताः। विचित्रकवचाः सर्वे नानाप्रहरणोद्यताः ।।१८।।

रावणाज्ञेने राक्षसांचा हनुमंताला प्रतिरोध : रावणाज्ञा होतांचि पाहीं। वीर सिद्ध झाले ठायीं। कंगलटोप[१] लवलाहीं। कवचें तिहीं बाणलीं[२] ।।११।। नाना परींचीं अंगत्राणें[३]। विचित्रालंकार आभरणें। मायावेगें केलें धांवणें। कपिआंगवण लक्षूनी ।।१२।। सकळीं वेढिला कपींद्र। जेंवी मेघी दिवाकर। आच्छादिजे प्रकाशकर। तेंवी वानर कवळिला ।।१३।। कैंचा रे तूं कोण वानर। वेंगी कवळोनि डोंगर। गगनीं जासी सत्वर। परत निष्ठुर युद्धासीं ।।१४।। न भीसी तूं देवांसी। दानवांतें दृष्टी न आणिसी। राक्षसांतें न गणिसी। स्वस्थ जातोसी आकाशीं ।।१५।।

न त्वं बिभेषि देवानां दैत्यानां च महात्मनाम्। एवं तैर्निगृहीतस्तु विचिंत्येदं वचोऽब्रवीत् ।।१९।।

यदि प्राप्ताश्रया लोकाभवद्भिः सहिताः सुरा। ब्रह्माणमग्रतः कृत्वा न साम्यं मम केनचित् ।।२०।।

कोणातेंही दृष्टीं नाणिसी। गगनीं जातोसी वेगेंसीं। सांडी सांडी पवर्तासी। नाहीं तरी मरसी वानरा ।।१६।। ऐकोनियां राक्षसोत्तर। खवळला तो वानर। आलियाही चराचर। तरी कपींद्र नाटोपे ।।१७।। त्रैलोक्यींचे वीर समग्र। आलियाही सुरासुर। दानव मानव समग्र। तरी मी कपींद्र नाटोपें ।।१८।। सृष्टिकर्ते समग्र। ब्रह्मा आणि हरिहर। येऊं न शकती मजसमोर। दूत साचार रामाचा ।।१९।। तेथें तुम्ही कायसीं बापुडीं। धांवतसां लवडसवडीं। वृथा मराल रोकडीं। अर्ध घडी न लागतां ।।१२०।।

राक्षसांचा संहार करून हनुमंत पर्वत पूर्वस्थळी ठेवतो : ऐसें बोलोनि कपिनाथ। पुच्छ वाढविलें अद्‌भुत। जैसा काळपाश अकस्मात। धांवे कवळित जीवांसी ।।२१।। हातीं कवळोनि पर्वत। पुच्छ युद्धासीं मोकलीत। तेणें कंदन केलें तेथ। राक्षसांत मांडिला ।।२२।। अरे हा वायुसुत महाबळी। यासीं न चले अहाच कळी। सत्वर मिळोनियां सकळीं। हातफळी मेळवावी ।।२३।। वेगळालें जुंझ करितां। रणीं नाटोपे सर्वथा। सकळ मिळोनियां तत्वतां। मारूं आतां कपीसी ।।२४।। ऐसें विचारोनि मनीं। मिसळले युद्धालागोनी। तंव पुच्छ आलें जी ठाकोनी। ख्याती रणीं लावित ।।२५।। राक्षस करित झुंजारी[४]। वर्षते झाले शस्त्रास्त्रीं। तितकीं निवटीत पुच्छाग्रीं। कपिकेसरी बळवंत ।।२६।। जैसें अलक्ष काळचक्र। करी जीवांचा संहार। तैसें पुच्छ वेगवत्तर। राक्षसभार निवटित ।।२७।। एक शिळा टाकित। एक शस्त्रें वर्षत। एक अस्त्रें प्रेरित। दारुण मंत्र मंत्रोनी ।।२८।। मंत्रोनियां महाशक्ती। हनुमंतावरी सोडिती। एक निधडा निश्चितीं। केली शांती सकळांची ।।२९।। शक्तीची निजशक्ती। श्रीराम स्वयें चिच्छक्ती। तो राम स्मरतां कपिपती। झाली प्रतिहती[५] शक्तीची ।।१३०।। मुखीं श्रीरामाचें नाम। हृदयीं श्रीरामाचें प्रेम। इंद्रियीं श्रीरामाचें कर्म। तया दुर्गम कोण अर्थ ।।३१।। स्मरतां श्रीरघुनंदन। आलें सर्वांगीं स्फुरण। पुच्छें आदरिलें कंदन। राक्षसगण मारिले ।।३२।। शक्ति केलिया प्रतिहत। पुच्छे शस्त्रें पीठ करित। शिळा स्वयेंचि चूर होत। लागतां क्षय होय शस्त्रांचा ।।३३।।

---

शब्दार्थ : १. अश्वांची शिरस्राणे, २. धारण केली, ३. कवचे, ४. युद्ध, ५. नाश.

एकद्वित्रिचतुर्विंशच्चत्वारिंशत्तथा शतम्। लांगूलाग्रेण तान्वेष्ट्य भ्रामयित्वा व्यचिक्षिपत् ॥२१॥
अन्यांस्तु बलिनः शूरान्राक्षसान्भीमविक्रमान्। बध्वा लांगूलपाशेन पद्भ्यां संप्राहरत्कपिः ॥२२॥

एक दोन तीन चारी। पांच सात शतवरी। मारिल्या राक्षसांच्या हारी। कपिकेसरिनिज-पुच्छें ॥३४॥ महाभयानक क्रूर। रणयोद्धा महावीर। रामदूत महाशूर। केलें चरित्र तें ऐका ॥३५॥ एक बांधोनियां पुच्छांसीं। आदळिले गिरिपृष्ठेंसीं। पीठ करोनि अस्थींसीं। एक यमसदनासी पाठविले ॥३६॥ एक पायीं कवळिले। एक लाताताळीं रगडिलें। एक धाकेंचि निमाले। वीर पडिले असंख्य ॥३७॥ एकां पाहतां क्रूरदृष्टीं। धाकें करिती मूत्रवृष्टी। विकळ होउनियां उठाउठीं। प्राण शेवटीं सांडिती ॥३८॥ एक भुभुःकारें भ्यालीं। निःशेष देहातें विसरलीं। एक दिग्पुटीं[1] लागलीं। एक मुकली सर्वस्वा ॥३९॥

एवं सकंदनं कुर्वन्रक्षसां मेघवर्चसाम्। दिवाकर इव व्योम्नि सोऽगच्छद्वायुनंदनः ॥२३॥
अति देवकृतं कर्म दृष्ट्वा तस्य तु देवताः। साधु साध्विति भाषंतः पुष्पवर्षैरवाकिरन् ॥२४॥
हत्वा रक्षःसहस्राणि लांगूलचरणायुधैः। स्वस्थाने पर्वतं स्थाप्य रामस्याग्रे समागतः ॥२५॥
प्रणिपत्य ततो रामं सुग्रीवं सहलक्ष्मणम्। आचचक्षे तथा वृत्तं यावत्पूर्वं च सांप्रतम् ॥२६॥

जेंवी गगनीं रविमंडळ। मेघ आच्छदी सकळ। तेंवी येवोनि राक्षसदळ। गोळांगूळ आच्छादिला ॥१४०॥ तो रवि आपल्या निजकिरणीं। मेघांचें अंतर भेदूनी। स्वप्रकाशेंकरोनी। अवनी गगन प्रकाशी ॥४१॥ श्रीरामदळीं हनुमान वीर। जेंवी मूर्तिमंत दिवाकर। महामेघ राक्षसवीर। पाहती कपींद्र आच्छादूं ॥४२॥ बाप कपिकुळीं दिनमणी। पुच्छरूप निजकिरणीं। अंतरें सकळांची भेंदूनीं। ठेला करोनी वाताहत ॥४३॥ जेंवी सरोवरीं गज रिघे। कमळिणी निवटी वेगें। तेंवी कपीनें लागवेगें। राक्षस रागें मर्दिले ॥४४॥ पर्वतेंसहित युद्ध करित। देखतां देव समस्त। होवोनि सकळ विस्मित। स्तुति करीत कपीची ॥४५॥ मानवोनि सुरासुरीं। पुष्पवृष्टि कपिशिरीं। करिते झाले निजगजरीं। जयजयकारीं हर्षित ॥४६॥ सुर जयजयकार करित। विजयी झाला कपिनाथ। ठेवोनी स्वस्थानीं पर्वत। आला रघुनाथवंदना ॥४७॥ लोटांगण श्रीरामचरणां। नमन केलें लक्ष्मणा। सुग्रीवासी केलें नमना। अंगदही जाणा नमियेला ॥४८॥ बिभीषण शरणागत। त्यासीही नमी हनुमंत। येरें वानर समस्त। नमी कपिनाथ अति प्रीतीं ॥४९॥ श्रीरामें दिधलें आलिंगन। हृदयीं धरिला कवळून। सौमित्राचें जीवदान। तुवां जाण मज दिधलें ॥१५०॥

लक्ष्मणाची हनुमंताविषयी कृतज्ञताः सौमित्रें आलिंगिलें हनुमंता। तूं आमचा जीवदाता। सुखी केलें श्रीरघुनाथा। बहु आतां काय बोलूं ॥५१॥ आम्ही बंधु ते कुबंधु। तूं कांही नसोनि सुबंधु। आमचेनि रामा दुःखावबोधु। सुखावबोधु तुझेनि ॥५२॥ तुझ्या एक एक कर्मा। आठवितां प्लवंगमा। मन विसरे मनोधर्मा। वरोत्तमा हनुमंता ॥५३॥ सीताशुद्धीची मात। स्मरतां चित्त चकित। वधूं जातां इंद्रजित। जाहलों प्रतिहत आम्ही तेथें ॥५४॥ एकलेनि वीरें आपण। जुत्पती आणि वानरगण। शरणागत बिभीषण। तुवां आपण वांचविला ॥५५॥ जो अदट त्रैलोक्यासी। त्या मारविलें इंद्रजितासी। यश दिधलें मज सौमित्रासीं। काय तुजपासीं तुझें सांगूं ॥५६॥ शोक करितां रामासीं। तुवां पावोनि वेगेंसीं। सावध करोनि स्वामीसी। स्वस्वरूपासी प्रबोधिलें ॥५७॥ राम सकळ स्वरूपस्थिती। तो राम प्रबोधिला मारुती। दास्य करिसी अहोरातीं। ख्याती त्रिजगतीं रामदूता ॥५८॥ श्रीरामसुख प्रकाशक। हनुमान झाला सत्य एक। सुखाचेंही सोलींव सुख। कपिनायक मारुती ॥५९॥

शब्दार्थ : १. दाही दिशास.

लक्ष्मणाच्या स्तुतीला हनुमंताचे समर्पक उत्तर : ऐसा स्तवोनियां हनुमंत। सौमित्र चरणां लागत। येरें सुखावोनि त्वरित। चरण वंदित सौमित्राचे॥१६०॥ म्हणे सौमित्रा ऐक विनंती। जितुकी कपीची शक्ती। तितुकी रामनामाची ख्याती। नामेंवीण मारुति कांहीं नेणे॥६१॥ जेव्हां संकट कांही पडत। तेव्हांचि रामनाम स्मरत। नामें विघ्न भस्म होत। विजयी कपिनाथ लटिकाचि॥६२॥ श्रीरामनाम स्मरतां। द्वंद्वें नुधविती माथा। विघ्नें हाणोनियां लाता। कपि तत्वतां निजविजयी॥६३॥ जितुकें कपीचें बळ। तितुकें नामचि केवळ। हें तूं जाणसी सकळ। अति अविकळ रामभजनें॥६४॥ ऐसें विनवोनि सौमित्रासी। आलिंगिलें सुग्रीवासी। बिभीषणादि अंगदासी। वानरांसी आलिंगी॥६५॥ सांगितलें सकळ वृत्त। जाहली युद्धे बहुत। रामें निवारलीं समस्त। कपिनाथ रक्षिला॥६६॥ पूर्वीं येथून जातेवेळां। रावणें राक्षस पाठविला। कपटाश्रम निर्मिला। गोवूं लागला कपीसी॥६७॥ श्रीराम स्मरतां चित्तीं। झाली कपटाची उपहती। राक्षस मारिला निश्चितीं। प्रतापशक्ती नामाची॥६८॥ जळसरोवराभीतरीं। शापदग्ध निशाचरी[1]। गिळावया कपिकेसरी। पायीं झडकरी झोंबली॥६९॥ पायीं झोंबतां कपीसीं। राम स्मरोनि आवेशीं। मारूं आदरिलें राक्षसीसी। रामें तिसी उद्धरिलें॥१७०॥ तिणें राक्षसाची मात। मज सांगितला वृत्तांत। कपटी म्हणोनियां घात। करितां मुक्त रामें केला॥७१॥ ओषधींतें राखिते। चौदा सहस्र गंधर्व तेथें। रणीं मिसळले युद्धातें। ते श्रीरामें निवटिले[2]॥७२॥ पुढें भरताची भेटी। ते सांगितली सकळ गोष्टी। पर्वत नेतां संकटीं। राक्षस कोटी उठावले॥७३॥ हातीं असतां गिरिवर। युद्ध झालें घोरांदर[3]। नामें निवटिले समग्र। क्षणमात्र न लागतां॥७४॥ स्वस्थ ठेवोनि पर्वत। परतोनि आलों येथ। ऐकतां कपीचा वृत्तांत। वानर समस्त सुखावले॥७५॥ माथां वाहोनि पुच्छाटी। घालिती कोल्हाटें उफराटीं। हरिखल्या वानरकोटी। बाप जगजेठी हनुमंत॥७६॥ एका जनार्दना शरण। राक्षस निर्दळूनि जाण। पर्वत स्वस्थानीं स्थापून। कपिनंदन निजविजयी॥१७७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमद्गिरिस्थापनं नाम पंचाशत्तमोऽध्यायः॥५०॥ ओंव्या॥१७७॥ श्लोक॥ २६ ॥ एवं ॥२०३॥

## अध्याय एकावन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### अहिरावण - महिरावण यांचा संवाद

पर्वस्थानी पर्वत ठेवून हनुमंताचे आगमन : स्वस्थानीं ठेवोनि पर्वत। विजयी झाला कपिनाथ। श्रीराम आनंदें डुल्लत। हरिखें नाचत कपिसैन्य॥१॥ शरणागत बिभीषण। राजा सुग्रीव आपण। सौमित्रातें जीवदान। हनुमंतें जाण दीधलें॥२॥

वानरसैन्याची रामांना रावणावर चालून जाण्याची विनंती : काळें तोंड लंकानाथा। ब्रह्मशक्ती झाली वृथा। पळोनि गेला न झुंजतां। तोंड मागुता न दाखवी॥३॥ जरी येता झुंजासीं। क्षणें मारितो रावणासी। वानर उडती आवेशीं। लंकेशासी मारावया॥४॥ आज्ञा पुसती रामासी। वेगें निरोप दे आम्हांसी। अद्यापि याची भीड कायसी। लंकेशाशी मारावया॥५॥ पांडू त्रिकूटाचे कडे। उचटूं दुर्गीचे धोंडे। नगर विध्वंसूं रोकडें। श्रीरामापुढें बोलत॥६॥ तुवां कां धरिलें मौन। कां न देसी आज्ञापन। वानर करिती उड्डाण। लंकाकंदन करावया॥७॥

पराभूतावर शस्त्र न चालविण्याचा श्रीरामांचा संदेश : ऐकोनि वानरांचें वचन। बोलता झाला रघुनंदन। रावण पळाला पाठ देऊन। पळत्या आपण नये मारूं॥८॥ क्षात्रधर्म ऐसा आहे। जो

शब्दार्थ : १. राक्षसी, २. संहारिले, ३. भयंकर.

संमुख रणी उभा राहे। उशिण्याधायीं[1] युद्ध ना हें। शास्त्रीं पाहें बोलिलें॥९॥ संमुख रावण न येतां। केंवी मारूं लंकानाथा। लंका दिधली शरणागता। ते विध्वंसितां महादोष॥१०॥ ऐसें बोलोनि रघुनाथ। केले वानर स्वस्थ। येरीकडे लंकानाथ। झाला सचिंत निजगृहीं॥११॥

रावणाचे नवीन उपायाचे चिंतन: सैन्य निमालें समस्त। प्रधानादि प्रहस्त। कुंभकर्णा केला घात। उभा बाणीं त्वरित फोडिला॥१२॥ खातां न पुरे त्रिभुवन। काळाचा घांस करी आपण। तो मारिला जाण। विंधोन बाण कुंभकर्ण॥१३॥ सुरवरां ज्याचा धाक। ज्यासी कांपती ब्रह्मादिक। चौदा वेळ सुरनायक[1]। आणिला देख बांधोनी॥१४॥ जाणे शस्त्रास्त्र संपूर्ण। मंत्र तंत्र क्रियाविधान। अभिचाराचें जन्मस्थान। वीर दारुण इंद्रजित॥१५॥ ब्रह्मादिकां न कळे वहिला। ऐसा प्रयत्न दोनी वेळ केला। तो शरबंध वृथा गेला। वायां गेला खटाटोप॥१६॥ होम करोनि दारुण। केला शंकर प्रसन्न। अश्वसहित सशस्त्र स्यंदन[2]। काढिला आपण अग्नीमाजी॥१७॥ भोंवतीं आवरणें अत्युग्र। तीं निवटोनियां समग्र। होम विध्वंसिती वानर। केला घाबरा इंद्रजित॥१८॥ अत्युग्र मंत्रावरण। नभीं गुप्त शस्त्रावरण। भूतगणांचें आवरण। अति दारुण सभोंवतें॥१९॥ शाकिनी डाकिनी महाशक्ती। कात्यायनी सैन्यासहिती। चामुंडा होम राखिती। अहोरातीं निजबळें॥२०॥ भैरवरक्षण दारुण। अति दारुण वेताळ जाण। झोटिंगांचे आवरण। सावधान राखत॥२१॥ ऐसा अतिबळें बळवंत। अति निगुतीं होम करित। अग्निकुंडीं रथ प्राप्त। होतां त्वरित धाडी आली॥२२॥ अदट वीर हनुमंत। कळिकाळा दृष्टीं नाणित। रामनामें सदा गर्जत। अवचित तेथ पावला॥२३॥ नामें मंत्राची क्षीण शक्ती। नामें शस्त्रांची उपहती। नामें आकळिल्या शक्ती। भूतें होती शरणागत॥२४॥ भूतें शक्ति वेताळ। हनुमंतासीं प्रसन्न सकळ। करोनियां रणकल्लोळ। होमज्वाळ विध्वंसिला॥२५॥ त्यासीं करुठा[4] बिभीषण। चितावोन कपिनंदन। सवें आणिला लक्ष्मण। इंद्रजित आपण मारविला॥२६॥ पवनीं दहनीं गगनीं। अवनीं आणि जीवनीं[1]। जेथ जेथ जाय पळोंनी। कपि धांवोनी पावे तेथ॥२७॥ पळून जातां मेघपृष्ठाआड। तंव तेथ पावे माकड। करोनियां खंडविखंड। रणीं प्रचंड पाडिला॥२८॥ सौमित्रा लागली शक्ती। तरी न वचे विकळ गती। शिर कापोनी हातोहातीं। श्रीरामाप्रती पाठविलें॥२९॥ शक्तिविकळ लक्ष्मण। तेथें लवलाहें सुषेण। सांठा ओषधींचा काढोन। सुमित्रानंदन उठविला॥३०॥ एकेक वीर बळवंत। रणयोद्धे रणोन्मत्त। वानरदळ अत्यद्भुत। संग्रामांत नागविती॥३१॥ रामसौमित्र दोघे वीर। अतुळ बळाचे जुंझार। दमूं शकती काळचक्र। सुरासुर कांपती॥३२॥ तेथे माझी कोण शक्ती। अनावर हा रघुपती। अत्यद्भुत ब्रह्मशक्ती। नेली भस्मांती सौमित्रें॥३३॥ खड्ग लागे हृदयावरी। सौमित्र पडिला धरेवरी। दिव्यौषधी कपिकेसरीं। आणोनि झडकरीं उठविला॥३४॥ पर्वत नेतां स्वस्थाना। उठली राक्षससेना। तितुकी मारितां कपिनंदना। अर्ध क्षण न लागेचि॥३५॥ हातीं असतां डोंगर। जुंझों आले राक्षसभार। पुच्छें निवटिले समग्र। क्षणमात्र न लागतां॥३६॥ पुच्छाचिये संवसाटीं। मारिल्या राक्षसकोटी। दुजा वीर नाहीं सृष्टीं। बळ मर्कटीं अनिवार॥३७॥ रणीं नाटोपे सहसा। सांडिला संग्रामाचा धिंवसा[5]। माझा प्राण वांचेल कैसा। चिंता लंकेशा अनिवार॥३८॥ चिंतेचा अग्नि दुर्धर। रावणा लागला अनिवार। नाठवती भोगोपचार। दशशिर तळमळी॥३९॥ भय सुटलें दुर्धर। विसरला कर्मतंत्र। कर्माकर्मी रघुवीर। सत्य साचार लागला॥४०॥

श्रीरामांच्या भीतीने रावणास सर्वत्र रामरूप भासू लागले : बैसों जातां आसनीं। राम प्रकटे

शब्दार्थ : १. इंद्र, २. रथ, ३. आश्रय केलेला, ४. उदकांत, ५. धैर्य.

सुखासनीं। उठूं जातां तत्क्षणीं। सायुध नयनीं देखिजे ॥४१॥ अभ्यंग मार्जन करितां। स्नेहीं देखे रघुनाथा। खुंटली स्नेहाची वार्ता। श्रीरघुनाथाचेनि भेणें ॥४२॥ रामभय लागलें जीवीं। स्नेह तुटला सर्वभावीं। स्नान मार्जन भोगपदवीं। राम भावी सर्वत्र ॥४३॥ बोणें[1] वोगरिलें[2] भोजना। षड्रस अन्न ताटीं जाणा। घांस घेतां रावणा। रघुनंदना देखिलें ॥४४॥ ताट भोक्तां परवडी देख। अवघा झाला रघुकुळटिळक। वेडावला दशमुख। रघुनायक ग्रासीं दिसे ॥४५॥ ग्रास घ्यावया पुरता। अवकाश नाहीं रिता। नभ मिनलें रघुनाथा। चिदाभासता कोंदली ॥४६॥ हातवणी[3] आणिलें कलशीं[4]। तेथें देखे राघवासी। हाडपी[5] देतां विडियांसी। रघुनाथासी देखिलें ॥४७॥ नापित दावी दर्पण। भीतरीं दिसे रघुनंदन। माझेंचि रूप झालें आन। रावणपण न दिसे ॥४८॥ न पाहतां पळो जाय। भूमिका तेही राम होय। सर्वथा न चालती पाय। गमन पाहें खुंटलें ॥४९॥ धाकें आला निद्रास्थाना। तेथें देख रघुनंदना। भयें विस्मित झाला मना। दशानना अति चिंता ॥५०॥ जवळी देखतां मंदोदरी। राम म्हणोनि हाका मारी। येरी हांसली झडकरी। दशशिरीं आक्रांत ॥५१॥ घरें खांब उथाळें भिंती। अवघीं रामरूप भासती। रावण झालासे चकित चित्तीं। मूर्च्छागतीं पडियेला ॥५२॥

आसने शयने तिष्ठन्भुंजानः पर्यटन्महीम्। चिंतयानो हृषीकेशमपश्यत्तन्मयं जगत् ॥१॥

उठणें बैसणें निजणें। खाणें जेवणें अवघ्राणें[6]। देखणें ऐकणें स्पर्शणें। सकळ देखणें श्रीराम ॥५३॥ वाचेची वचनोक्ती। इंद्रियांची क्रियाशक्ती। प्राणांची प्राणशक्ती। राम निश्चितीं होवोनि ठेला ॥५४॥ अहंकाराची अहंकृती। अंतःकरणाची आवरणशक्ती। सर्वभावें लंकापती। स्वयें रघुपती व्यापिला ॥५५॥ जवळी येवोनि मंदोदरी। सावध करी दशशिरी। भ्रांत झालासी कां शरीरीं। धीर निर्धारीं सांडिला ॥५६॥ दृष्टीं देखतां स्त्रीलिंग। योगिया होय योगभंग। तापसाचा तपोभंग। होय सांग स्त्रीवाक्यें ॥५७॥ व्रतधारियाचा व्रतभंग। याज्ञिकाचा निजयाग। स्त्रीवाक्यें गेला सांग। होय व्यंग स्त्रीवाक्यें ॥५८॥ कर्मठासीं कर्मभ्रम। धर्मिष्ठासीं क्षण धर्म। नेमिष्ठाचा भ्रमे नेम। करी भस्म स्त्रीवाक्य ॥५९॥ उपासकाची उपासना। ध्यानस्थाचें ध्यान जाणा। ज्ञानियाच्या निजज्ञाना। करी उगाणा[7] स्त्रीवाक्य ॥६०॥ ऐकतां स्त्रीवाक्यासी। शुक नागवला तपासी। चढला अभिमान मानसीं। हरिहरांसी गणेना ॥६१॥ शिव देखतां मोहिनी। ध्यान विसर्जिलें तत्क्षणीं। लंगोटीची दाणादाणी। शंकर मनीं वेडावला ॥६२॥ तेथें रावण बापुडें किती। क्षणें आणिला देहस्थिती। हडबडीत निजचित्तीं। लंकापति उठिला ॥६३॥ काय करूं मी निश्चितीं। कैसे माझे प्राण वांचती। सर्व कर्मीं रघुपती। लागला निश्चितीं मारावया ॥६४॥ काय विचारों मी मंत्र। तळमळी दशशिर। तंव आठवला विचार। हरिख थोर वाटला ॥६५॥ दूत धाडूं पाताळासी। महिकावती नगरीसीं। समाचार वेगेंसीं। अहिरावणासी जाणवूं ॥६६॥ अहिरावण महिरावण। सख्खे बंधु दोघे जण। रणयोद्धे अति दारुण। रामलक्ष्मण मारतील ॥६७॥ निश्चिय मानोनि चित्तीं। हरिखला लंकापती। मारावया रघुपती। दूत निश्चितीं पाठवूं ॥६८॥ जीविताशा बलीयसी[8]। दूत धाडी पाताळासीं। समाचार अहिरावणासी। महिरावणासी सांगत ॥६९॥

विचारांती रावण पाताळात अहिरावणाकडे दूत पाठवितो: दूताप्रती रावण। सांगता झाला मधुरवचन। येथील वृत्तांत आपण। यथार्थ जाण सांगावा ॥७०॥ युद्ध झालें श्रीरामासीं। रामें मारिलें सैन्यासी। प्रधानादि प्रहस्तांसी। राक्षसांसी मारिलें ॥७१॥ इंद्रजित आणि अखया कुमर। पुत्र मारिले समग्र। उरला असे रावण मात्र। त्यासीहि सत्वर मारिती ॥७२॥ म्हणवोनि

शब्दार्थ : १. अन्न, २. वाढिले, ३. उदकात, ४. तांब्यातू, ५. विडे, ६. हुंगणे, ७. नाश. ८. मोठी, बळकट.

तुम्हांपासीं। मज धाडिलें वेगेंसीं। सांगविलें युद्धकथेसी। आतां जाणसी ते करीं ॥७३॥ म्हणवोनि आज्ञापिला दूत। गेला पाताळा त्वरित। समाचार समस्त। रावणोक्त सांगितला॥७४॥ अहिरावण आदरेंसीं। पुसता झाला दूतासी। युद्ध रामरावणांसीं। कोण हेतूसीं लागलें॥७५॥ हा साद्यंत समाचार। मज सांग सविस्तर । मारितां रामसौमित्र। निमेषमात्र मज नलगे॥७६॥

दूत अहिरावणाला प्रथमपासून वृत्तांत सांगतात : ऐकोनि अहिरावणमात । दूत आदरें सांगत। जनकराजा अत्यद्‌भुत। विदेहस्थ मिथुलेसीं ॥७७॥ जानकी त्याचें कन्यरत्न। लावण्यगुणनिधान। तिचें स्वयंवर आपण। जनकें जाण मांडिलें॥७८॥ मूळें पाठविलीं सकळ। देशोदेशींचे भूपाळ । नगरीं मिनले सकळ। जनकबाळ साधावया॥७९॥ यक्षगण गंधर्व। सिद्ध मिनले जी सर्व। पाहों आले स्वर्गींचे देव। विमानीं थांव घेवोनी॥८०॥ रावणही तेथें गेला। राक्षसगणीं परिवारिला। जानकी देखोनि वहिला। होवोनि ठेला मूर्च्छित॥८१॥ तेथें आली ऋषिमंडळी। विश्वामित्रादि सकळी। राम सौमित्र त्यांजवळी। शिष्यमेळीं बैसले॥८२॥ जनकाचा दुर्धर पण। भार्गवदत्त चाप गहन। जो चढवील तयासीं गुण। जानकीं जाण तया वरी॥८३॥ चाप दृष्टीं पाहतां। वीर मूर्च्छित तत्वतां। राजे चकित झाले चित्ता। जनकदुहिता लाभेना॥८४॥ राजीं सांडिलें सामर्थ्य। देखोनियां जनक बोलत। निर्वीर उर्वी[१] समस्त। वीर निश्चित असेना॥८५॥ जनकाचें वचन दारुण। ऐकोनि क्षोभला रावण। चापीं चढवावया गुण[२]। स्वयें आपण सरसावला॥८६॥ तंव विपरीत झालें तेथें। माथा राहिला भूमीतें। तळ धरिला हातें। गर्वोन्मत्तें रावणें॥८७॥ गर्वाचिया उद्धतीं। सज्ज करितां चापाप्रती। झाली गर्वाची उपहती। गुण निश्चितीं चढेना॥८८॥ फिरवितां त्या धनुष्यासी। घोळसिलें रावणासी। चंद्री लागली नेत्रांसी। तोंडा खरसी[३] पैं आली॥८९॥ उरावरी पडलें धनु। खुड्डुपे हातपाय रावणु। जनक आला जी धांवोनु। धनुष्य काढोन उठविला॥९०॥ बहुत अपमानला चित्तीं। पाहों लागला निश्चितीं। कोण चढवील गुण सीतीं। सभेप्रती धनुर्वाडा॥९१॥ तंव उठिला रघुवीर। बाळ निमासुर सुंदर। ठाणमाण मनोहर। पीतांबर कांसेसी॥९२॥ मदनमोहन सांवळा। टिळक रेखिला पिंवळा। कंठीं वैजयंती माळा। मुकुट बाणला रत्नांकित॥९३॥ सज्ज धनुष्य तूणीर[४]। पाठीसीं बंधु सौमित्र। रंगामाजी रघुवीर । रावणें समोर देखिला ॥९४॥ बाळ दिसतसे धाकुला। माथ्याचा जार नाहीं वाळला। मरणा धरणें कां बैसला। शिकविल्या नायके ॥९५॥ ऐकोनि रावणवचन। श्रीराम झाला हास्यवदन। घेवोनि गुरूचें आज्ञापन। मध्यें धनुष्या जाण उचलिलें॥९६॥ धनुष्या चढवोनियां गुण। वोढी काढितां रघुनंदन। मध्यें कडाडिलें जाण। गेलें मोडून तीं ठायीं॥९७॥ सबळ देखोनि रघुनाथा। लाज लागली लंकानाथा। सर्वथा[५] नुधवीच माथा। निघे मागुता अधोवदन॥९८॥ श्रीरामें पर्णिली सीता। तैंपासून लंकानाथा। लागली अनिवार अवस्था। म्हणे जनकदुहिता केंवी साधे॥९९॥ पितृवचनें रघुनाथ। वना निघाला त्वरित। सीतासौमित्रांसमवेत। वनें हिंडत दुर्गम॥१००॥ पुढें जनस्थाना पातले। खरदूषणांसी युद्ध झालें। त्रिशिरादि राक्षस मर्दिले। रामें निवटिले बाणधारां॥१॥ चवदा सहस्र रक्षोगण। त्रिशिरादि खर दूषण। रामें विंधोनियां बाण। मारिले क्षण न लागतां॥२॥ शूर्पणखा नकटी केली। ती बोंब घेवोनि वहिली। रावणसभे सांगों आली। रामें गांजिली म्हणोनी॥३॥ नकटें नाक घेवोनि पुढें । रावणा सांगे वाडेंकोडें[६]। जानकीचें रूप गाढें। निजनिवाडें वानित॥४॥ बंधू मारिल्याचें दुःख । अणुमात्र नाहीं देख। स्वयें झाली निर्नासिक। तरीही हरिख सीतेचा॥५॥ शिकवोनियां नानायुक्ती। प्रबोधिला लंकापती। सीताहरणासीं युक्ती। केली निश्चितीं ते ऐका॥६॥ मृगवेष मारीचासी ।

शब्दार्थ : १.पृथ्वी, २. धनुष्याची दोरी, ३. फेस, ४. भातां, ५. वर करीना, ६. परोपरीने.

देवोनि धाडी रामापासीं। सीता देखोनि वेगेंसीं। मागे कंचुकीसीं मृगत्वचा॥७॥ श्रीराम निघाला बाहेरी। मृगें काढोनि नेला दूरी। सौमित्रासी सीता सुंदरी। धाडी झडकरी रामामागें ॥८॥ गुंफेसीं एकली सीता। जाणोनियां तत्वतां। भिक्षुकवेषे रावण सीता। हरावया सर्वथा तेथें आला॥९॥ नकटीच्या बोला भुलला। राज्यपदातें विसरला। रंक भिकारी झाला। नकटीनें केला उपकार॥११०॥ मज भिक्षा दे वो माते। म्हणोनि मागे जानकीतें। येरीं पूजिला अतिथ्यें। निजचित्तें कृपाळु॥११॥ ते भगवद्बुद्धीं पूजित। हा कपटें हात घालित। उचलोनि खांदी घेत। येरी स्मरत श्रीरामनाम॥१२॥ आक्रंदतां सीता सुंदरी। रावणें आणोनि झडकरी। अशोकवनिकेमाझारीं। ठेविली निर्धारीं दु:खित॥१३॥ त्या दिवसापासून जाण। विघ्नें उठलीं दारुण। शोकाकुलित रावण। केलें कंदन लंकेचें॥१४॥ सीताशुद्धीसीं वानर। आला जैसा पर्वताकार। नगर विध्वंसिलें समग्र। घरोघरें जाळिलीं॥१५॥ चौदा सहस्र बनकर। ऐशीं सहस्र किंकर। जंबुमाळी प्रधानपुत्र। अखयाकुमर मारिला॥१६॥ इंद्रजितासीं करोनि रण। धुळी मेळविला जाण। सभेमध्यें येवोनि आपण। राजा रावण गांजिला॥१७॥ आगी लावितां पुच्छासीं। जाळिलें दाढ्या मिशांसी। सर्वेंचि उडोनि वेगेंसी। माड्या गोपुरांसी जाळिलें॥१८॥ परतोनि गेला वानर। घेवोनि आला रघुवीर। शिळीं बुजोनि सागर। दुर्ग चौफेर वेढिले॥१९॥ बिभीषण शिकवी रावणा। न मानोनि त्याच्या वचना। लाता हाणिल्या जाणा। तो गेला शरण श्रीरामा॥१२०॥ पहिलें करितां रणकंदन। असंख्य सैन्य मारिलें जाण। कळवळोनि रघुनंदन। शिष्टाई आपण मांडिली॥२१॥ ते न मानीच रावण। दूतें निर्भार्त्सिला आपण। मारूं धांवे दशानन। येरु गगनीं उसळला॥२२॥ गगनीं उसळला वानर। मंडप उचलिला समग्र। नेला श्रीरामासमोर। बळियाढा वीर अंगद॥२३॥ मग खवळला रघुवीर। सकळ वानरांचा भार। सैन्य मारिलें समग्र। वानरवीर महाबळी॥२४॥ मारिले प्रधान समग्र। मारिले कुमरें कुमर। इंद्रजित जो महावीर। तोही सत्वर मारिला॥२५॥ कुंभकर्ण काळांतक। त्यासी मारी रघुकुळटिळक। शंख करी दशमुख। कांहीं विवेक स्फुरेना॥२६॥ समरांगणीं करितां रण। नागवेचि रघुनंदन। रावणें साधिलें विंदान। पाठी देवोन पळाला॥२७॥ रावण जरी न पळता। राम त्यासी जीवें मारिता। धर्मयुद्ध श्रीरघुनाथा। घावो पळतां न घालीच॥२८॥ शक्ति लागली लक्ष्मणा। त्यासी वांचवावया जाणा। करोनि हनुमंतें उड्डाणा। पर्वत द्रोण आणिला॥२९॥ पर्वतींच्या दिव्यौषधी। घायीं पिळोनि त्रिशुद्धी। उठवी सुषेण सुबुद्धीं। प्रखर बुद्धी वानरा॥१३०॥ कांहीं न चलेचि मत। दाहीं मुखीं शंख करित। तळमळीत लंकानाथ। समाचार येथे पाठविला ॥३१॥ तुम्हीं करोनि धांवणें। रामसौमित्र मारणें। अन्यथा[1] मरिजे रावणें। राक्षसीं होणें देशोधडी[2]॥३२॥ मागुती तुम्ही येथें स्वस्थ। वांचोनि लाहा[3] जीवें जीत। न जिंकितां रघुनाथ। ऐसा आकांत मांडेल॥३३॥ म्हणवोनि तुम्ही जाण। कुढवावा[4] रावण। अन्यथा होईल कंदन। राक्षसगण निमतील॥३४॥

वृत्त ऐकून अहिरावणाचे आवेशयुक्त आश्वासन: ऐसें सांगतां दूतासीं। अहिरावण मानसीं। क्षोभला अति आवेशीं। काय दूतासी बोलत॥३५॥ आजवरी तुम्हां काय झालें। सैन्य अवघें मारविलें। पुत्र प्रधान जीवें गेले। कुंभकर्णाही वधियेलें बाणधारीं॥३६॥ सकळ कुळा शांती केली। मग बोंब येथें पाठविली। मूर्खपणाची शीग[5] झाली। काय बोलीं बोलावें॥३७॥ दोघे माणूस ते किती। सवें वानरदळसंपत्ती। त्यासाठीं कुंथाकुंथी। वीर किती मारविले॥३८॥ आम्हां राक्षसांचे भक्ष। देखा उघड माणूस। वानरें कोशिंबिरीस।

शब्दार्थ : १. नाहीतर, २. देशांतरी जाणे, ३. असा, रहा, ४. रक्षण करावा, ५. कमाल, कळस.

राक्षसास न पुरती ॥३९॥ अवघीं घालितां मुखाप्रती। हाडही न लागे दांतीं। तिहीं मारिल्या राक्षसपंक्ती। आश्चर्य किती सांगावें ॥१४०॥ सकळ सैन्या केला घात। थोर शहाणा लंकानाथ। चिंता न करीं होई स्वस्थ। राघवांत मी करीन ॥४१॥ ऐसें बोलोनि वहिलें। दूता लंकेसी धाडिलें। रावणातें आश्वासिलें। अहिरावणें महिरावणें ॥४२॥ सर्वथा न करीं चिंता। सुखें असावें लंकानाथा। रामसौमित्रांच्या घाता। निश्चितार्था करूं आम्ही ॥४३॥

दूतांना परत पाठवून अहिरावण - महिरावण यांची अंबिकेची आराधना : ऐसें गर्जोनि हरिखें। दूत बोळविला कौतुकें। स्वयें नवसिती अंबिके। माते आवश्यकें कृपा करीं ॥४४॥ रामसौमित्र हाता। लागतांचि तत्वतां। दोघांचिया निजघाता। करूं सर्वथा तुजपुढें ॥४५॥ षोडशोपचारीं पूजा। करोनियां अति वोजा। प्राप्त व्हावा रघुराजा। प्रसाद वोजा[1] मागती ॥४६॥ प्राप्त झालिया प्रसादासी। आम्ही न भिवों कळिकाळासी। सर्वथा न होऊं उदासी। द्यावें प्रसादासी झडकरी ॥४७॥ बहुतांपरी विनविती। करुणा अनिवार भाकिती। विचित्रा स्तुती पढती। मग प्रार्थिती ते जगदंबे ॥४८॥ जगदंबा जाणे आपण। विश्वात्मा रघुनंदन। त्याच्या वधालागून। इहीं प्रार्थन मांडिलें ॥४९॥ कपटी दुरात्मे राक्षस। करून राहिले पाताळवास। भेटी न होतां श्रीरामास। हे कोणास नागवती ॥१५०॥ यांचा वध न होतां जाण। धराभार नुतरे पूर्ण। स्वामी कष्टेल रघुनंदन। मागुतेन मारावया ॥५१॥ श्रीरामाची दासी। साह्य होईन राघवासी। मारवीन या दुष्टांसी। श्रीरामासीं सुखार्थ ॥५२॥ विश्वास व्हावया राक्षसांसी। मोकली वामांगमाळेसी। प्रसाद येतां हातासीं। अति उल्लासी राक्षस ॥५३॥

अंबिका-प्रसाद प्राप्तीसंबंधी अहिरावण-महिरावण यांच्यामध्ये मतभेद : महिरावण संकोचला। वामप्रसाद नव्हे भला। अहिरावणें निर्भर्त्सिला। प्रसादकळा तुज न कळे ॥५४॥ वामसव्यभाग पाहीं। देवा संकल्पविकल्प नये कांहीं। मुख्यत्वें देहचि नाहीं। अवयव कायी कल्पिसी ॥५५॥ नाबदेचे नारळ गोमटे। सबाह्य गोडीचे सांठे। त्यांसीं काढूं जाता कवठें[2]। स्वयेंचि करंटें होइजे ॥५६॥ सुवर्णाची केली मूर्ती। नख केश अवयव निगुतीं। सर्वांगीं पाहता निश्चितीं। सुवर्णस्फूर्ती ढळेना ॥५७॥ गोडी सबाह्य साखरेसीं। कां घृत जेंवी घटासीं। थिजतां विघरतां तुपासीं। पालटीसीं अभावो ॥५८॥ तेंवी देवाची मूर्ति पाहीं। सगुण निर्गुण भेद नाहीं। अवयव कल्पूं नये कांहीं। वाम सव्य न पाहीं विभाग ॥५९॥ प्रसाद तैसाचि देख। जो आला तो आवश्यक। फळ देईल गा अचूक। जाण निष्टंक महीपति ॥१६०॥ प्रबोधोनि महिरावण। करिता जाला विवंचन[3]। युक्ति सांगे महिरावण। रघुनंदन साधावया ॥६१॥ एका जनार्दना शरण। मात ऐकोनि अहिरावण। विचार करिता झाला पूर्ण। श्रोतीं अवधान मज द्यावें ॥१६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अहिरावणमहिरावणसंवादो नाम एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥५१॥ ओंव्या ॥१६२॥ श्लोक ॥१॥ एवं ॥१६३॥

## अध्याय बावन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### हनुमंत -मकरध्वज भेट

अहिरावण - महिरावण यांच्याकडून वानरसैन्याची टेहळणी : अहिरावण महिरावण। धराया रघुनंदन। करिते झाले विवंचन। सावधान अवधारा ॥१॥ पाताळ सांडोनि त्वरित। जाले रणभूमीसीं प्राप्त। धरोनि न्यावया संधि पाहत। अहोरात्र सावध ॥२॥

---

**शब्दार्थ :** १. आवडीने, २. करवंटी, ३. विचार.

हनुमंताची प्रतिकारार्थ सिद्धता : येरीकडे वानरभारीं। दळ सज्जी कपिकेसरी। सन्नद्धबद्ध द्रुमकरी। निजगजरीं हरिनामें॥३॥ हनुमान वीर निजभक्त। रामभजनीं सावचित्त। करोनियां कुरवंडी जीवित। स्वामीस राखित अहर्निशीं॥४॥ राक्षस मायावी निश्चितीं। युद्धीं पावले उपहती। धूर[1] चोरिती अतर्क्यगती। म्हणोनि कपिपती राखित॥५॥ न म्हणे वेळ अवेळ। दिवस रात्र अक्षर पळ। घटिका मुहूर्त काळवेळ। अचळ रामभजनीं॥६॥ सर्व शरीर सर्वसंपत्ती। अंतर्बाह्य श्रीरामभक्ती। वेंचिली असे मारुतीं। साक्षेपस्थितीं अवधारा॥७॥ एकलें मन श्रीरामभक्तीं। लावितांचि बाह्यवृत्ती। सहज अर्पिलें रघुपती। इंद्रियस्थिति श्रीराम॥८॥ मनें वचनें कर्मस्थिती। राखिता झाला रघुपती। श्रोतीं अवधान द्यावें चित्तीं। कथासंगती सांगेन॥९॥ मनें कवळोनियां ध्याना। मोकलूं न जाणे रघुनंदना। संकल्प विकल्प गमनागमना। रघुनंदनासरिसेंचि॥१०॥ बुद्धिनिश्चयें जाण। सावधान रघुनंदन। राखिते झाले अनुदिन। क्षणें क्षण न विसंबे॥११॥ चित्तचिंतनसमवेत। धरोनि राहिले रघुनाथ। अहर्निशीं राम राखित। सावचित्त सर्वदा॥१२॥ निजभिमानी कपिपती। रामोहमस्मि निजवृत्ती। धरोनि राहिला रघुपती। अहोरातीं सावध॥१३॥ अंत:करण व्यापक पाहीं। राम राखे सर्वां ठायीं । बालाग्रमात्र सवडी नाही। राखण पाहीं हनुमंत॥१४॥ अंतरीं ऐसा हनुमंत। सर्वभावीं रघुनाथ। क्षणक्षणां सांभाळित। बाह्यव्रत अवधारा॥१५॥ दृष्टिविषय रघुनंदन। दृश्यमात्रीं भरला जाण। राखता झाला अनुदिन। अनुसंधान अखंड॥१६॥ श्रवणद्वारीं शब्दविषयो। अर्थावबोधें रामरावो। राखितसे महाबाहो। भक्तरावो हनुमंत॥१७॥ घ्राणद्वारें गंधावबोध। श्रीरामपरम मकरंद। श्वासोच्छ्वासीं परमानंद। अगाध बोध कपीचा॥१८॥ रसनारसें विषयस्थिती। श्रीराम स्वयें चिच्छक्ती। गोडियेमाजी रघुपती। वीर मारुति न विसंबे॥१९॥ त्वचा आलिंगितां स्पर्शीं। उडवूनि शून्यत्व आकाशीं। मिठी घालोनि श्रीरामासी। चिदाकाशीं राखित॥२०॥ वाचेनें शब्दव्युत्पत्ती। गांठ घातली रघुपती। बोलतां व्यवहार वदंती। राम मारुति न विसंबे॥२१॥ हस्ताची क्रियाशक्ती। क्रियामात्र रघुपती। घेतां देतां अर्थजाती। राम मारुति न विसंबे॥२२॥ चरणाचें गमनागमन। आचरणेंचि राम जाण। पाऊलही न पडे शून्य। रघुनंदनावांचोनी॥२३॥ लिंगाची स्वानंदरती। तंव ऊर्ध्वरेता[2] मारुती। अखंडाननंद रघुपती। सहजस्थितीं राखित॥२४॥ गुदाचा स्वभाव क्षर। क्षरीं अक्षर रघुवीर । उडवोनि क्षराक्षर । राम कपींद्र राखत॥२५॥ राम प्राणाचा पाळक। कपि रामाचाही रक्षक। होवोनियां एकाएक। रघुकुळटिळक राखित॥२६॥ पुच्छदुर्ग करोनि कटका[3]। द्वारमुखाचे अलोलिका। कर्णरंध्रीं निर्गम देखा । कपिनायक रचीतसे॥२७॥ उरलें पुच्छाचें जें अग्र। तें तळीं वरी निरंतर। भंवे जैसे विष्णुचक्र। अहोरात्र सावध॥२८॥ वारियासी रीघ नाहीं। तेथे राक्षसें बापुडीं कायी। भ्रमण करिती लवलाहीं। धुरा पाहीं चोरावया॥२९॥

अहिरावण-महिरावण यांचे चिंतायुक्त होऊन कुलदेवतेला आवाहन : फेरे केले लक्षांत। तरी राम नोहे प्राप्त। भजनहीना रघुनाथ। नव्हे प्राप्त सर्वथा॥३०॥ बहुत झाले खेदक्षीण। प्राप्त नव्हे रघुनंदन। मग करूं आदरिलें स्तवन। कुळदेवता जाण कामाक्षी॥३१॥ सकळ कामना संपूर्ण। स्मरतांचि करी आपण। म्हणवोनि तिसीं अभिधान। कामाक्षी जाण बोलती ॥३२॥ बुद्धीची बुद्धी आपण। परमात्मा रघुनंदन। राक्षसां वोळला[4] संपूर्ण। मोक्षदान द्यावया॥३३॥ जंव नुपजे तीव्र अवस्था। शरण न रिघवे रघुनाथा। तंव कैंची मोक्षवार्ता। दु:खावर्तामाजी पडिजे॥३४॥ राक्षस दोघे चिंताक्रांत। राघव साधावया तळमळित । तें जाणोनि श्रीरघुनाथ। बुद्धि प्रेरीत ते ऐका॥३५॥ मांडिलें कामाक्षीस्तवन। तिचा प्रकाशक रघुनंदन। शक्तिरूपें संतोषोन। झाला प्रसन्न राक्षसां॥३६॥

---

**शब्दार्थ :** १. धनी, २. ज्याच्या वीर्याला पतन नाही असा, ब्रह्मचारी, ३. सैन्याला, ४. अनुकूल झाला.

हनुमंताला शेपटीचा वेढा काढण्याची श्रीरामांची आज्ञा : राक्षसांची करुणा। न सहावेचि रघुनंदना। बोलावोनि कपिनंदना। मधुर वचना बोलत॥३॥ हनुमंता तुझेनि नामें। विघ्नें दिक्पुटीं लागावें। भयें माथें नुधवावें[1]। निर्भय व्हावें चराचर॥३८॥ ऐकतां कपिनामोच्चार। भेणें कांपती सुरासुर। येवढा ज्याचा नामनिर्धार। तो भेणें दळभार राखित॥३९॥ ऐसी तुझी अपकीर्ती। विस्तारेल त्रिजगतीं। ऐसें न करी मारुती। सांडीं निश्चितीं निजभय॥४०॥ काढीं पुच्छाचा पैं वेढा। करीं दारवंठा उघडा। स्वैर विचरूं दे माकडां। हुडाहुडां आल्हादें॥४१॥ श्रीरामकटकीं अवरोध। हे गोष्टीचा असंबद्ध। क्षात्रधर्मा पावे बाध। माथां अपवाद बैसेल॥४२॥ देहभय दारुण। यत्न करावा जरी आपण। तरी सामर्थ्या आली नागवण। काळें वदन तयाचें॥४३॥ देहभयें विषयसुख। सर्वथा प्राप्त नव्हे देख। अथवा नव्हे सांसारिक। परमार्थ देख तेथ कैंचा॥४४॥ देहभयें साधन। सिद्ध न साधे गा जाण। देहभयें कर्माचरण। वृथा जाण जातसे॥४५॥ देहभयें न साधे योग। देहभयें न साधे याग। देहभयें स्वर्गभोग। नव्हे सांग निजप्राप्ति॥४६॥ देहभयें सकळ दुःख। अणुमात्र नव्हे सुख। आकल्प भोगावे नरक। दुःख अलोलिक देहसंगें॥४७॥ तें देहभय आम्हांप्रतीं। असतां कैंची वीरवृत्ती। सकळ धर्मांची होय शांती। भयें निश्चितीं देहाच्या॥४८॥ लोकापवाद बैसे माथां। देहभय रघुनाथा। ते चुकवावें हनुमंता। वेढा तत्वतां काढोनी॥४९॥ ऐकोनियां रामवचन। हनुमान घाली लोटांगण। अगाधबोध रघुनंदन। आम्हां पामरां ज्ञान कैंचे॥५०॥ चरण वंदोनि तत्वतां। वेढा काढिला परता। कर जोडोनियां रघुनाथा। संमुखता राहिला॥५१॥ सुग्रीवादि वानरभार। त्यांसी सांगे रघुवीर। सुखें निद्रा करा समग्र। भयमात्र धरूं नका॥५२॥ लाहोनियां[2] श्रीरामाज्ञा। वानर गेले निद्रास्थाना। लाज उपजली वायुनंदना। स्वयें विवंचना करीतसे॥५३॥ श्रीराम सकळांसी राखिता। त्या सांभाळीतसें रघुनाथा। कोण माझी उद्धतता। कोण अर्था जीतसें[3] ॥५४॥ श्रीराम राखे त्रैलोक्यासी। त्या मी राखितसें रामासी। काळिमा लागली ज्ञानासी। कर्मठवेषी यथार्थ॥५५॥ अगाधबोध रघुनाथा। प्रबोधिली यथार्थ वार्ता। मज एवढी कोण चिंता। स्वस्थ आतां सुखें निजों॥५६॥ ऐसें जाणोनि कपिकेसरीं। वेढा काढिला झडकरी। आपुलाले मेळिकारीं। सुखें वानरीं निद्रा केली॥५७॥ जाणोनियां पुढील कायार्थ। निद्रा करी रघुनाथ। राक्षस वेगें आले तेथ। चोरोनि नेत रघुनाथा॥५८॥

निशि निद्रां समापन्नौ दाशरथी जहर्तुर्भृशम्। कुणपाद्वायुके पाशे यथा पातालमासुरैः॥१॥

निद्रिस्त रामलक्ष्मणांना राक्षस मध्यरात्री घेऊन जातात : पडली गडधूप अंधारी। मध्यरात्रीं निशाचरीं। येवोनियां झडकरीं। केली चोरी धुरेची॥५९॥ जैसे यमाचे यमपाश। न लक्षती कोणास। वेगें काढोनि प्राणास। नेती उदास निर्भय॥६०॥ सुहृदस्वजनांदेखतां। भूमीवरी सांडूनि प्रेता। प्राण हरी तत्वतां। कोणाही सर्वथा लक्षेना॥६१॥ तैसें प्रेतरूप वानरां। सांडोनियां मेळिकारां[4]। दोघां जणीं दोनी धुरा। पाताळद्वारा पळविल्या॥६२॥ राम वानरांचें जीवन[5]। राम वानरांचा जीवप्राण। रामेंवीण वानरगण। प्रेतवत् जाण सकळिक॥६३॥ जरी रामें प्रबोधिला। तरी न राहे उगला। घरटीकार होवोनि वहिला। पाहे वेळोवेळां हनुमंत॥६४॥

राम-लक्ष्मण नाहीसे झाल्यामुळे हनुमंताचे चिंतायुक्त होऊन प्रयाण: आलगेचा[6] आला जव फेरा[6]। तंव न देखे दोनी धुरा। होवोनि अत्यंत घाबरा। पाहे सैरा कटकांत॥६५॥ मळमूत्रासीं नाहीं गेला। वनविहारा नवचे वहिला। श्रीराम कोणीकडे गेला। वेडावला कपिनाथ॥६६॥

शब्दार्थ : १. वर करू नये, २. संपादून, ३. जिवंत आहे, ४. सोबत्यांना, ५. आधार, ६. गस्तीचा.

युद्ध करितां भागला पूर्ण। गेला मेळिकार सोडून। केलें अयोध्येंसीं गमन। वंचिलों पूर्ण श्रीरामें ॥६७॥ हेंही न घडे सर्वथा। तो न विसंबे शरणागता। दीन वानरां समस्तां। सांडी सर्वथा हें न घडे॥६८॥ शरणागता कृपाळ। श्रीराम दीनदयाळ। एवढा ब्रीदाचा कल्लोळ। वानरमेळ सांडील कां॥६९॥ बिभीषणा जाणवूं मात। आणि सुग्रीव वानरनाथ। गोष्टी फांकतां कटकाआंत[१]। होईल आकांत सकळिकांसी॥७०॥ गोष्टी जाईल लंकेसीं। ठाउकें पडेल रावणासीं। धांवोनि येईल वेगेंसीं। अंत सकळांसीं करील॥७१॥ रावण बापुडें ते किती। त्यासी मारावया जुत्पती। एकएकाची अद्‌भुत शक्ती। करितील शांती रावणाची॥७२॥ तथापि राजनीतिविचार। आच्छादावा[२] समाचार। धुरेवरीच पडले चोर। जघन्ये[३] थोर वीरवृत्ती॥७३॥ ऐसें विचारोनि कपिनाथ। बिभीषणा सावध करित। आणि सुग्रीव वानरनाथ। वृत्तांत सांगत तयां दोघां॥७४॥ येरां समस्तां कळों न देतां। पाहों लागले रघुनाथा। कोठें न देखती सर्वथा। तिघां अति चिंता वर्तली॥७५॥ बिभीषण सांगे तयांसी । व्यर्थ जाणे न घडे रामासीं। कांही योजिलें कार्यासी। न पुसतां कोणासी मग गेला॥७६॥ सर्वांगाचे दुर्ग करोनी। स्वामी राखतां अनुदिनीं। रामें हनुमंत निवारोनी। कार्यालागोनी स्वयें गेला॥७७॥ आतां काय करणे विचार। म्हणोनि झाले चिंतातुर। तंव सरसावला कपींद्र। काय उत्तर बोलत॥७८॥ तुम्ही सावध रहा येथें। कळों न द्यावें कोणातें। संरक्षावें सैन्यातें। अति सामर्थ्ये सावध॥७९॥ मी जावोनि वेगेंसीं। झाडा घेईन त्रैलोक्यासीं। शोधोनि श्रीरामासी। अति वेगेंसीं आणीन॥८०॥ सप्त पाताळांची चवडी[४]। उल्लंघीन न लागतां घडी। खचीन पर्वतांच्या दरडी। पृथ्वी रोकडी वाटीन॥८१॥ एकवीस स्वर्गांच्या उतरंडी। पाडीन न लागतां घडी। पीठ करोनि रोकडी। मिळवीन तांतडी अव्यक्तासीं॥८२॥ मोडीन वैकुंठ कैलासासी। शीक[५] लावीन महेशासी। अनुग्रहिलें[६] रावणासी। उद्धत त्यासी करविलें॥८३॥ रावण बापुडें तें किती। क्षणें नेईन भस्मांतीं। लंकेची करीन शांती। त्रिकूट निश्चितीं खचवीन॥८४॥ शोधीन विवरेंविवर। उल्लंघीन गिरिकंदर। तुम्ही दळभार रहा समग्र। अहोरात्र सावध ॥८५॥ मात गुप्त करोनि सत्वर। भारीं राहवोनि समग्र। निघता झाला कपींद्र। अति सत्वर रामकार्या॥८६॥ निघोनि कटकाबाहेरी। चिंताक्रांत कपिकेसरी। काय करूं गा श्रीहरी। बुद्धि झडकरी मज देईं॥८७॥ तूं अनाथांचा नाथ। निजभक्तां संरक्षित। न विसंबसी शरणागत। तोही रणांत सांडिला॥८८॥ शरणांगतां वज्रपंजर। ऐसा ब्रीदाचा बडिवार। वाढविला अपार। तो साचार करीं रामा॥८९॥ उपेक्षिसी शरणागतां। बोल लागेल निजव्रता। आणि विरुद्ध वेदशास्त्रार्था । दीन अनाथां सांडितां॥९०॥ ऐसी तीव्र चिंता करितां । कृपा उपजली रघुनाथा। बुद्धि दिधली कपिनाथा। गेला तत्वतां यक्षिणीवटा॥९१॥

हनुमंताची आदिशक्तीला प्रार्थना: यक्षिणीवटातळीं मारुती। स्तविता झाला आदिशक्ती। तुज गमन त्रिजगतीं। माझी विनंती परिसावी॥९२॥ सांडोनि वानरभारा सकळा। रामसौमित्र कोठें गेला। याचा समाचार वहिला[७]। मज सांगितला पाहिजे॥९३॥ तुम्ही पूर्वी मज प्रसन्न। म्हणोनि तुम्हासी आलों शरण। वेंगीं सांगा रघुनंदन। केउतें[८] गमन केलेंसे॥९४॥ मज वृत्तांत न सांगतां। क्षोभ वाटेल रघुनाथा। ऐसें जाणोनि सर्वथा। शुद्धि[९] तत्वतां सांगावी॥९५॥ ऐकोनि कपीचे उत्तरा। हडबडिली ते सुंदरा। त्यासी न सांगितल्या समाचारा। करील संहारा सर्वांसी॥९६॥ अद्‌भुतशक्ति कपिनाथ। नाहीं कळिकाळासी भीत। नित्य रामनामें गर्जत। राम सेवीत सर्वदा॥९७॥ आम्हीं न सांगताही वृत्त। कार्य साधील निश्चित। आपण यश

शब्दार्थ : १. सैन्यामध्ये, २. गुप्त ठेवावा, ३. निंद्य, ४. चवड, ढीग, ५. शिक्षा, ६. कृपा केली. ७. सत्वर, ८. कोठे, ९. शोध.

घेतल्या येथ। श्रीरघुनाथ सुखावे ॥९८॥ आम्ही न सांगों जरी। कार्य साधील तो तरी। मारील राक्षसांच्या हारी। चराचरीं निजविजयी ॥९९॥ क्षोभ आलिया कपीसी। जीवें मारील सकळांसी। म्हणोनि पहिलेंचि कपीसी। समाचारासी जाणवूं ॥१००॥ गोष्टी सांगों जरी स्पष्ट। समाचार होईल प्रकट। क्षोभोनियां रावण दुष्ट। करील सपाट[1] सर्वांचें ॥१॥

आदिमायेकडून गिधाडाच्याद्वारे हनुमंताला मार्गदर्शन : काय करूं विचार। म्हणोनि झाली चिंतातुर। बुद्धि स्फुरली सत्वर। प्रकारांतर[2] योजिलें ॥२॥ गीध गीधी वृक्षावरी। बैसली असतां परस्परीं। पक्षिणीचे संचरोनि अंतरीं। कपिकेसरीतें वृत्त सांगे ॥३॥ गीधातें म्हणे गीधिनी। मज डोहळे होती मनीं। नरमांस पाहिजे भोजनीं। तें कोठोनी मेळविसी ॥४॥ तूं माझा प्राणपती। मी तुझी अर्धांगशक्ती। झणें उदास होसी चित्तीं। डोहळे निश्चितीं पुरवावे ॥५॥ गीध म्हणे गीधीप्रती। त्वरा न करावी सर्वांर्थीं। अनायासें मांस प्राप्ती। तुज निश्चितीं होईल ॥६॥ अहिरावण महिरावण। सखे बंधु दोघे जण। चोरोनियां राम लक्ष्मण। नेले जाण पाताळा ॥७॥ त्यांच्या धांवण्यासी त्वरित। जावोनियां कपिनाथ। करील सकळांचा घात। मांस बहुत मिळेल ॥८॥

हनुमंताचे पाताळामध्ये गमन: ऐसें बोलतां तिहीं दोघी। कपीनें ऐकिलें वेगीं। आनंद भरला सर्वांगी। गर्जे सवेग रामनामें ॥९॥ भूमी हाणोनि लात। विवर केलें अत्यद्‌भुत। गेला पाताळा हनुमंत। राक्षसनाथ जेथ असे ॥११०॥ येरीकडे ते राक्षस। घेवोनि आले दोघांस। पुरले नवसिले नवस। जगदंबेस पूजित ॥११॥ पूजोपचारसामग्री। मेळविली बहुतांपरी। अति उल्लास राक्षसभारीं। निजगजरीं मांडिला ॥१२॥ आतुर्बळी वानर। मार्ग काढील सत्वर। धांवण्या वेगत्तर। येईल कपींद्र पैं येथें ॥१३॥ मग कांही न चले मत। युद्ध करील त्वरित। सोडवील रघुनाथ। शक्ति अद्‌भुत कपीची ॥१४॥

राक्षसबंधु रामलक्ष्मणांना मकरध्वजाच्या बंदोवस्तामध्ये ठेवतात: म्हणोनि नगरबाह्यप्रांतीं। राखणें ठेविली सभोंवतीं। मकरध्वज द्वाराप्रती। अद्‌भुतशक्ती राखण ॥१५॥ चौदा सहस्र राक्षस। अद्‌भुतशक्ती दुर्धर्ष[3]। द्वारीं सावध अनिमेष[4]। मकरध्वजासमवेत ॥१६॥ न लावितां पातया पातें। द्वार राखिती सावचित्तें। तंव हनुमान पावला तेथें। श्रीरामातें पहावया ॥१७॥ कपिरूपें जातां भीतरीं। वळखी पडेल राक्षसभारीं। राम आच्छादोनि झडकरी। महामारीं उठतील ॥१८॥ युद्धाचें भय नाहीं मज। परी न लाभे रघुराज। सिद्धी न पवे स्वामिकाज। ऐसी वोज नये करूं ॥१९॥

साधुवेषामध्ये हनुमंताचे आगमन: साधावया स्वामिकार्यासी। झाला तापसी तीर्थवासी। तापसवेषें राजद्वारासीं। भीतरीं जावयासी पैं आला ॥१२०॥ अत्यंत चतुर कपिपती। रामप्रभावें स्तविली शक्ती। माया प्रेरिली निश्चितीं। लागली सुषुप्ती सर्वांसी ॥२१॥

मकरध्वजाचा हनुमंताला प्रश्न: जो स्वामिकार्या सादर। त्यासीं नव्हे माया साचार। सावध मकरध्वज वीर। निरंतर स्वामिकाजीं ॥२२॥ माध्यान्हीं निशीं वेशीपासीं। देखिला अवचितां तापसी। भीतरीं जातां वर्जिले त्यासी। जासी निशीं केउता ॥२३॥ भिन्न असतां मध्यरात्र। कोठें जासी न पुसत। धरोनियां तापसव्रत। स्वेच्छा जात नगरांत ॥२४॥ भिक्षुकाचा धर्म पाहीं। दिवसा अपराण्हसमयीं। गृहस्थ जेविल्या निजगृहीं। जावें तिहीं भिक्षेसी ॥२५॥ यजमान सकळ तृप्त। घरींचा वैश्वानर शांत। भिक्षेसी काळ तोचि प्राप्त। यथोचित भिक्षुका ॥२६॥ उचित काळ सांडोनियां जाण। अकाळीं करितां गमन। लागे स्वधर्मा

शब्दार्थ : १. नाश, २. दुसरीच युक्ती, ३. अजिंक्य, ४. डोळ्यांची पाती न हालविता.

दूषण। ऐसें आपण न करावें॥२७॥ तूं अकाळीं गमन करिसी। निजधर्मा बोल लाविसी। स्वामी क्षोभेल आम्हांसी। कोण निशीथीं[1] विचरत॥२८॥ आणिकीं ठेवावें दूषण। तें आम्हीच करितों प्रार्थन। येथून परतावें आपण। करावे गमन स्वाश्रमा॥॥२९॥ ऐकोनि तयाचें बोलणें। तापस क्षोभला निजमनें। कांही धर्माधर्म नेणे। बैसविलें कोणें तुज येथें॥१३०॥ आम्ही विरक्त तापसी। स्वेच्छें विचरूं अहर्निशी। कोठेंही निर्बंध नाहीं आम्हांसी। तूं कां वारिसी निजमूर्खा॥३१॥ निवारितां साधूसी। स्वयें अध:पाता जासी। बोल आम्हांसी ठेविसी। व्यर्थ तापसीं शापिलें॥३२॥ ऐकोनि त्याचें बोलणें। मकराक्ष क्षोभला मनें। अकाळीं स्वेच्छा विचरणें। हें साधुत्व कोणें शिकविलें॥३३॥ जरी वांचविणें निजशरीरा। तरी परतावें माघारा। मग होसील घाविरा॥ धोत्रां वस्त्रां सांभाळीं॥३४॥

हनुमंताचे व मकरध्वजाचे युद्ध : ऐकोनि क्षोभें तापस बोले। तुज कां शाप देणें लागलें। थापा हाणोनि दोनी डोळे। पाडीन तत्काळ भूमीसीं॥३५॥ येरू क्षोभला तत्क्षणीं। मिसळले युद्धा लागूनी। दोघे आले झोंटधरणी। निष्ठुर वचनीं बोलती॥३६॥ थापा हाणिती येरयेरां। गुडघे कोंपर परस्परां। बुकिया हाणिती सैरावैरा। दोहीं वीरां बळ सम॥३७॥ परस्परें हाणिती थडका। परस्परें हाणिती झडका[2]। परस्परें घालिती धडका। एकमेकां मेचेना[3]॥३८॥ युद्ध करितां दोघे जण। परस्परें खेदक्षीण। हनुमान विचारी आपण। हा कोण कैंचा पां येथें॥३९॥ माझ्या घायाचेनि आघात। पीठ होताती पर्वत। अद्यापि वांचला जीवें जीत। कोण निश्चित पुसों पां॥१४०॥ अरे कोण तूं काय आहेसी। माझ्या धायी वांचलासी। वेगीं सांग मजपासीं। यमापासीं अन्यथा धाडीन॥४१॥

हनुमंताला मकरध्वजाचे आत्मकथन: ऐकोनी त्याचें बोलणें। मकराक्ष क्षोभला निजमनें। काय बोलत प्रतिवचनें। सावधानें अवधारा॥४२॥ युद्ध करितां भागलासी। काकुळती येवोनि पुससी। तरी ऐक यथार्थेसीं। मी तुजपासीं सांगेन॥४३॥ सवेंचि बोले वचन। तुज सांगोनि कार्य सोण। जाया दिधलें जीवदान। सुखें गमन करावें॥४४॥ सुखरूप न करिसी गमन। तरी स्वर्गा तुज धाडीन। पुसतचि आहेसी तूं कोण। सावधान अवधारीं॥४५॥ वायुसुत कपिराज। त्या हनुमंताचा आत्मज[4]। माझें नांव मकरध्वज। बळ माझें पित्यासम॥४६॥ अहिरावण महिरावण। हे सखे बंधु दोघेजण। तिहीं मज ठेविलें रक्षण। द्वारीं संपूर्ण आपुलिये॥४७॥ त्यांचे कुळीं कुळस्वामिणी। कामाक्षी जाण यक्षिणी। तिसी बळिदानालागोनी। मानव दोनी आणिले॥४८॥ त्यांच्या धांवण्यालागून[5]। स्वर्गमृत्यु-लोकींहून। येईल कोणी धांवून। म्हणोन राखण ठेविलें॥४९॥ आतां स्वस्ति असो तुजलागीं। सुखें जाय आले मार्गीं। अन्यथा वृथा जाशी वेगीं। ग्रासभागीं यमाचे॥१५०॥ ऐकोनि त्याचें उत्तर। क्रोधें झाला कालाग्निरुद्र। नेत्र भवंडी गरगर। बोले कपींद्र तें ऐका॥५१॥

रे रे वानर सावधानमनसा वार्ता क्षणं श्रूयतां सोऽहं मारुत राघवस्य कृपया पत्नीभगं नेक्षितम्।
मिथ्या जल्पसि वेषवानरतनुः कोणात्मजो लक्ष्यसे एहि त्वं समरे निशाचरगणैः पुत्रांतकोऽहं किल॥२॥

हनुमंताला आश्चर्य वाटते व तो वृत्तांत विचारतो : हनुमान म्हणे तयासी। तूं राक्षस कपटवेषी। धरोनि वानरवेषासी। पुत्र म्हणविसी हनुम्याचा॥५२॥ सांडोनि आपुला पिता। आणिकाचा पुत्र म्हणवितां। स्वयें जातोसी अध:पाता। लाज सर्वथा तुज नाहीं॥५३॥ ज्याचा पुत्र म्हणविसी। तो हनुमान मी निश्चियेंसी। जन्मादारभ्य तुज आम्हांसी। भेटी कैसी न झाली॥५४॥

शब्दार्थ : १. मध्यरात्री, २. धक्के, ३. पर्वा वाटली नाहीं, ४. पुत्र, ५. सोडविण्याकरिता.

कोणीं देखिलें ना ऐकिलें। पुत्र म्हणविसी उगलें। लांछन पूर्वजां लाविलें। जोड जोडिलें अध:पाता॥५५॥ श्रीरामकृपा मी हनुमंत। कौपीन लाधलों उदरस्थ। केव्हांही स्त्रीसंगाची मात। स्वप्नाआंतही न देखें॥५६॥ जन्मादारभ्य पत्नीभोग। म्यां देखिलें नाहीं स्त्रीलिंग। कैंचा पुत्र झालासी सांग। मातेसीं डाग लाविला॥५७॥ राक्षसाचा पुत्र होसी। आणि आणिकाचा म्हणविसी। जीवें नाहीं मारिलासी। करुणा भाकिसी अनिवार॥५८॥ तूं पुत्र आणिकाचा असतां। पिता म्हणविसी हनुमंता। व्यभिचारी केली निजमाता। देईन प्रायश्चिता तुज आजी॥५९॥ मी स्त्रीमात्रीं सहोदर। मज कैंचा स्त्रीपुत्र। सांडी परता कपटाचार। निघें सत्वर युद्धासी॥१६०॥ राक्षसगणसमवेत। दावीं आपुला पुरुषार्थ। पुत्रांतक मी हनुमंत। जाण निश्चित आलों असें॥६१॥

मकरध्वजाच्या मातेचे पूर्वकथेचे सत्यकथन: वचनें झाली संकोचता। मग पाचारिली निजमाता। पुसता झाला निजवृत्तांता। माझा पिता तो कोण॥६२॥ मगरी म्हणे मकरध्वजा। नोळखिसी तूं पवनात्मजा। भ्रमलासी कवण्या काजा। ऐक वोजा सांगेन॥६३॥ ब्रह्मचारी पवनपुत्र। त्यासी कैंचे स्त्रीपुत्र। तुझ्या उत्पत्तीचे चरित्र। ऐक सविस्तर सांगेन॥६४॥ सीताशुद्धीलागीं मारुती। आला होता लंकेप्रती। तेथें केली महाख्याती। लंकापती अपमानिला॥६५॥ पुच्छीं लावोनि आगी। उपरी धवलारांलागीं। दुर्गी लाविली आगी। हुडे[1] सवेग खचविले॥६६॥ जाळोनियां सकळ नगरा। वेगीं आला समुद्रतीरा। विझवावया पुच्छाग्रा। मांडिली त्वरा सागरीं॥६७॥ शरण आला समुद्र। तेणें विनविला कपींद्र। जळीं समग्र विझवितां पुच्छाग्र। जीव समग्र मरतील॥६८॥ पुच्छ ठेवोनियां तीरीं। हळुच विझवीं लहरीं। ऐसें विनवितां सागरीं। वचन कपींद्रीं मानिलें॥६९॥ पुच्छ तीरा ठेवून। लहरीं विझविलें सानसान। स्वेद[2] सांडिला निपटून[2]। तो आपण गिळिला॥१७०॥ अमोघवीर्य[3] वायुनंदन। त्याहीवरी रामभजन। स्वेदें झालें गर्भाधान। गर्भ संपूर्ण वाढला॥७१॥ त्या गर्भास्तव पाहीं। तूं झालासी माझ्या हृदयीं। पित्या पुत्रा दोघांही। भाग्यें पाहीं भेट झाली॥७२॥ तुम्हां दोघां वैरभावो। सर्वथा नसावा पहाहो। सांडून युद्धाचा अविर्भावो। महाबाहो आलिंगी॥७३॥ ऐकोनि मातेचें वचन। मकराक्षें घातले लोटांगण। येरें दिधलें आलिंगन। समाधान दोघांसी॥७४॥ एका जनार्दना शरण। झालें पिता पुत्रदर्शन। आतां वधूं अहिरावण। महिरावण समवेत॥७५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमंतकरध्वजदर्शनं नाम द्विपंचाशत्तमोऽध्याय: ॥५२॥ ओंव्या॥१७५॥ श्लोक॥२॥ एवं॥१७७॥

## अध्याय त्रेपन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नम: ॥

### महिरावणाचा वध

हनुमंत स्वत:ची चिंता व्यक्त करून मकरध्वजाचे साहाय्य मागतो: ऐकतां मगरीचें वचन। झालें हनुमंता समाधान। देवोनि पुत्रासीं आलिंगन। निजविवंचन[4] सांगत॥१॥ आमुचा स्वामी श्रीरघुनाथ। निद्राकांत कटकांत। वानर मेळिकारी निद्रिस्थ। राक्षसीं मत्त[5] पैं केले॥२॥ मोहनास्त्र सावधानता। घालोनियां तत्वतां। मोहन केलें समस्तां। सुषुप्ति अवस्था लागली॥३॥ कपटयोद्धे राक्षस। संमुख न येतीच संग्रामास। चोरोनियां श्रीरामास। पाताळास आणिलें॥४॥ पृथ्वी

शब्दार्थ: १. बुरुज, २. घाम पुसून, ३. ज्याचे वीर्य व्यर्थ जात नाही असा, ४. आपली चिंता, ५. मोहित.

पाहतां समस्ता। न सांपडती सर्वथा। पाताळासी आलों आतां। श्रीरघुनाथा पहावया॥५॥ तंव येथें शुद्धि लागली। तुम्हांसी भेटी झाली। श्रीरामप्राप्तीची वहिली[1]। बुद्धि भली तुम्ही सांगा॥६॥ तुमचे सोयरिकीचें सुख। आम्हांसी हेंचि अलोलिक। भेटवावा रघुकुळटिळक। आवश्यक तुम्ही आजी॥७॥ तुम्हांसारिखे साधुसंत। पुत्रधर्म आचरत। ऋणत्रयापासून मुक्त। पितर करित तें ऐका॥८॥ देवपितरमनुष्यऋण। तिहीं गुंतले प्राणिगण। ऐक याचें लक्षण। विवंचून सांगेन॥९॥ देवऋणें यागादिकीं। पितर मुक्त तिळोदकीं। मनुष्याचें ब्रह्मस्व कीं। फेडितां सुखीं स्वयें होती॥१०॥ मज भेटविल्या रघुनाथ। ऋणत्रयासी तुम्ही निर्मुक्त। विभागरचना यथार्थ। ऐक सुनिश्चित सांगेन॥११॥ देवांचा देव रघुनाथ। तो भेटला यथार्थ। देवऋणें नित्य निर्मुक्त। वेदशास्त्रार्थसंमत॥१२॥ मनुष्यनाट्यविडंबनें। रूप धरिलें रघुनंदनें। मनुष्य ऋणें मुक्त स्वयें होणें। जाण दर्शन तयाचेनि॥१३॥ सकळांचा जनक जाण। स्वयें श्रेष्ठ चतुरानन। त्याचाही जनक आपण। रघुनंदन साचार॥१४॥ त्या श्रीरामाची होता भेटी। पूर्वज कोट्यनुकोटी। उद्धरती उठाउठीं। श्रीराम दृष्टीं देखिलिया॥१५॥ ऋणत्रय बापुडें तें किती। ब्रह्मांडकोटी उद्धरती। कर्माकर्माची होय शांती। श्रीराममूर्ती देखिल्या॥१६॥ ऐसें जाणोनि निश्चितीं। राम भेटवावा मजप्रती। तेणें आम्हां तुम्हां अति प्रीती। कल्पांतींही खंडेना॥१७॥

मकरध्वजाला स्वामिद्रोहाची चिंता: ऐकोनियां कपिवचन। मकरध्वज बोले संकोचून। सांगितलें विवंचन। धर्म जाण तो होय॥१८॥ परी एकी संकोचता। स्वधर्माची हनुमंता। तूं माझा निजपिता। म्हणोनि आतां सांगेन॥१९॥ राक्षसांचें वेतन। खावोनियां जाण। देह पोशिला आपण। त्यांचें हनन कैंवी सांगू॥२०॥ तूं माझा निजपिता। म्हणोनि पुसतसें ताता। जेणें चुके अधःपाता। त्या अर्था सांगावें॥२१॥ स्वामिद्रोह न लागे अंगीं। पित्रवज्ञा न घडे जगीं। ऐसें विचारोनि वेगीं। कार्यालागीं प्रवर्तावे॥२२॥ ऐकोनि पुत्राचें वचन। संतोषला कपिनंदन। पुत्राचें स्वधर्मलक्षण। स्वयें आपण करिता झाला॥२३॥ श्रीराम आहे येथें। ऐसें कळलें निश्चितें। आतां काय पुसों यातें। बापुडें अनाथा कां गोवूं॥२४॥ ऐसें विचारोनि कपींद्र। वेगें स्मरला श्रीरामचंद्र। बुद्धि स्फुरली सत्वर। झाला अगोचर हनुमंत॥२५॥

हनुमंत देवालयांतील शक्तीचे स्तवन करितो: अदृश्य होवोनि हनुमंत। गेला देवालयाआंत। शक्ति देखिली अद्भुत। सुपूजित दिव्योपचारें॥२६॥ कर जोडोनि कपिनंदन। आदरिलें शक्तिस्तवन। तुवां कृपा पूर्वी करून। शुद्धि आपण सांगितली॥२७॥ यक्षिणीवटातळीं जाण। गीधद्वारा आपण। सुरस वाचा बोलोन। कपिनंदन प्रबोधिला॥२८॥ पावावया रघुनंदन। सांगीतलें विवंचन। वंदोनियां तें वचन। केलें आगमन तुजपासीं॥२९॥ प्रसन्न होवोनि तत्वतां। भेटवावें रघुनाथा। म्हणोनि चरणांवरी माथा। ठेवित तत्वतां हनुमंत॥३०॥

अंबिकेने स्वतःच्या जागी हनुमंताला बसवून गमन केले: ऐकोनियां कपिस्तवना। अंबा संतोषली जाणा। सांडोनियां निजासना। कपिनंदना ठाव दिधला॥३१॥ त्यासी न देता अभ्युत्थान[2]। क्षणें उठवील दैवतपण। सुरासुरां नागवे[3] जाण। यासी कोणें बोलावें॥३२॥ श्रीरामाचा निजभक्त। स्वामिकार्या त्वरित। आला असे हनुमंत। याचा कार्यार्थ साधावा॥३३॥ सकळ वीर राक्षसगण। क्षणें निर्दाळील जाण। मारोनियां अहिरावण। रघुनंदन नेईल॥३४॥ एवढा होईल गजर। म्हणोनियां तो कपींद्र। पूजिती झाली खेचर[4]। अतिसत्वर जगदंबा॥३५॥ धर्ममर्यादा हेचि देख। घरा आलिया हरिसेवक। पूजावे जी आवश्यक। तेंही देख साधलें॥३६॥ ऐसें विचारोनि चित्तीं। गेली जगदंबा परती। जाणोनियां मनोवृत्ति। बैसे मारुति आसनीं॥३७॥

---

शब्दार्थ : १. सत्वर, २. आदरसत्कार, ३. सापडत नाही, ४. गगनात संचार करणारी.

मध्यरात्री पूजाविधी व प्रसाद अर्पण: मध्यरात्रीची वेळ। झाला पूर्ण असुराकाळ[1]। पूजोपचार सकळ। घेवोनि तत्काळ भीतरीं आले॥३८॥ मग यथोक्त[2] बरवी पूजा। समर्पिली अति वोजा[3]। नैवेद्य नानापरींच्या खाजा[4]। राक्षसराजा आणित॥३९॥ आश्चर्य झालें वाडेंकोडें। हात दावित मुखाकडे। तंव पसरलीं जाभाडें। अन्न निवाडें खावया॥४०॥

अंबिकेचे प्रसादग्रहण पाहून राक्षसांना आश्चर्य: अहिरावण म्हणे नवल। अंबा पसरिते मुखकमळ। ताटें रिचवा[5] सकळ। प्रसन्नकाळ आजींचा॥४१॥ पसरोनियां आपुलें मुख। बोणें[6] घेत असे देख। शीघ्र आणा अन्न चोख। पात्रें असंख्य राहिली॥४२॥ पूजा करूं आजिवरी। मुख कधींच न पसरी। आजि दिसे नवलपरी। कामेश्वरी प्रसन्न॥४३॥ वडे मांडे फुगी पुरी। चोखट मैदाची तेलवरी। साखरें घोळलिया घारी। भात खिरी अति गोड॥४४॥ साखरमांडे कोरवडे। आंबवडे चिंचवडे। दहिंवडे दूधमांडे। वाडेंकोडें क्षीरधारी॥४५॥ भात सोज्ज्वळ जिरेसाळिया। जेंवी मोगरियाच्या कळिया। वरी दाळी मुगाचिया। घातलिया पद्धती त्यावरी॥४६॥ कढी ताकाची चोखट। वेळामिरे समसकट। फुरके घेतां पैं उद्भट। ब्रह्मांडकोटी गर्जत॥४७॥ क्षीर चोखट वळवटाची। वरी पंचधार साखरेची। लोणी तावून अति सुरुची। वाटी तुपाची भरियेली॥४८॥ वेळामिरें कापूर। शुंठीआदि सकळोपचार। करोनियां अति अरुवार[7]। दहींभात सत्वर आणिला॥४९॥ ऐशा ताटांचिया हारी। मुखीं घालितां कोटीवरी। तृप्त नव्हे ती खेचरी। विचार करी निजचित्तें॥५०। जितुकें रांधिलेंसे अन्न। तितुकेंही वेंचिलें संपूर्ण। मग मांडिले फळभोजन। नाना जातिप्रकार॥५१॥ तेंही सरलें पैं देख। मग आणिलें आणिक। पुढें ठेवितां एकाएक। गटका देख पैं केला॥५२॥ रोटी पोळी गुळवरी। दिवसीं मुटकलें भारी। न लागतां दशनांतरी[8]। गटका करी जगदंबा॥५३॥ बहुतां दिवसांची भुकेली। रामागमनें सुखी झाली। अन्न स्वीकारूं लागली। तृप्ति वहिली पैं नव्हे॥५४॥ हनुमंताचा विचार पूर्ण। राक्षसां वोळला रघुनंदन। द्यावयासी मोक्षदान। येथें गमन पैं केलें॥५५॥ श्रीरामाचा मी किंकर। मोक्ष देईल निर्धार। मागें राहतां अणुमात्र। वासना सत्वर ओढील॥५६॥ राक्षसांचे सर्वस्वें देखा। नार्पितां रघुकुळटिळका। न पावती मोक्षसुखा। म्हणोनि देखा गटकावी॥५७॥ तंव बोलती रक्षोगण[9]। अहिरावणा परिस वचन। अंबेसीं तृप्तीलागीं जाण। रघुनंदन आणावा॥५८॥

राक्षस श्रीरामांना अभ्यंगस्नान घालून देवीपुढे आणतात: ऐकोनि राक्षसांच्या बोला। अहिरावण संतोषला। मान सकळां दिधला। अतिप्रीतीकरोनियां॥५९॥ ज्यालागीं कष्टलों बहुत। तों साधला कार्यार्थ। वेगीं आणोनियां रघुनाथ। करूं तृप्त जगदंबा॥६०॥ म्हणोनि आज्ञापिले सेवक। वेगीं आणा रघुकुळटिळक। स्नान घालोनि विधिपूर्वक। सत्वर देख येथे पैं॥६१॥ वेगीं लाहोनि शासन। आले कारागृहा ठाकून। जेथे होता रघुनंदन। दूत जाण तेथें आले॥६२॥ करवून अभ्यंगस्नानें। लाविले हळदोचें उटणें। घातलीं करवीरसुमनें। कंठाभरणे शोभती॥६३॥ पाशबंधनी बंधु दोघे। बाहेर काढिले वेगें। लागलीं वाजंत्री अनेगें। मिरवितां जगें देखिजे॥६४॥ हाटवटींचे[10] लोक। नरनारी असंख्य। देखोनि रघुकुळटिळक। अलोलिक मानिती॥६५॥ वृत्ति जडली रघुवीरीं। प्राशन केला नेत्रद्वारीं। नेवोनियां अभ्यंतरी। नरनारी भोगिती॥६६॥ बोलती नगरनागरिक। अवलोकितां रघुकुळटिळक। फिकें होत समाधिसुख। त्यासीं देख घात करिती॥६७॥ मदनमोहन श्रीराम। त्यासी मारूं नेती अधम। कृपा करो पुरुषोत्तम। होवो भस्म राक्षसां॥६८॥ यांचा करूं जातां घात। पुरला राक्षसांचा अंत।

शब्दार्थ : १. राक्षसवेळ, २. यथाशास्त्र, ३. उत्तम प्रकारे, ४. खाद्ये, ५. ओता, ६. अन्न, ७. परोपरीने, ८. दातांमध्ये, ९. राक्षससमूह, १०. बाजारचे.

सहकुळ मरतील निश्चित। भविष्य वदत वाग्देवी॥६९॥ सत्य जनी जनार्दन। वृथा नव्हे त्याचें वचन। मांडले राक्षसांचे निधन। कपिनंदन मारील॥७०॥ बाप कृपाळु रघुनंदन। राक्षसां वोळला संपूर्ण। वैरिया द्यावया मोक्षदान। स्वयें अपमान साहतसे॥७१॥ करितां वाद्यांचा गजर। देवीसंमुख रघुवीर। आणविला वेगवत्तर। देखतां कपींद्र विस्मित॥७२॥ कोण कृपेचें विंदान। मूढ अविवेक राक्षसगण । त्यांसी द्यावया मोक्षदान। एवढा अपमान साहतसे॥७३॥ प्रत्यक्ष करावें जरी नमन। तंव राहिलोसें आच्छादून। प्रकट होतां नये जाण। कार्य संपूर्ण जंव साधे॥७४॥ करोनि मनोमय नमन। चरित्र पाहतसे आपण। तंव बोलिला अहिरावण। रघुनंदन ऐकत॥७५॥

रामांना इष्ट देवतेचे स्मरण करण्याची राक्षसांची आज्ञा : खड्गधारा करोनि सतेज। बोलतसे राक्षसराज। आतां वध करीन मी तुज। स्मरें निजगुज आपुलें॥७६॥ तुझें आराध्यदैवत। त्यातें स्मरें पां त्वरित। मग झालिया तुझा घात। विस्मरणांत बुडसील॥७७॥ तूं म्हणवितोसि आपणियातें। विश्व स्मरत आहे मातें। तो तूं बांधला आहेसी येथें। स्मर निजचित्तें कुवासा[1]॥७८॥

आत्मा त्वं भुवनैकनायक रघो सूक्ष्मातिसूक्ष्मं जगु र्वेदैः सोपनिषत्पुराणगणकैर्बद्धोऽसि देव्यग्रतः। तच्छ्रुत्वा रघुवंशकेसरियुवा रौद्रीं तनुं चिंतयन्मुक्तः सानुजराघवस्य पुरतो दृष्टो हनूमान्कपिः॥१॥

आपणिया म्हणविसी रामा। जो मी विश्वाचा विश्वात्मा। वेदांसी न कळे महिमा। रूपनामा अतीत[2]॥७९॥ सूक्ष्माचेंही अति सूक्ष्म। लक्षालक्षातीत परम। उपषिदांसी दुर्गम। मनोधर्म थोटावे॥८०॥ नेत्रीं देखिला[3] न वचे[3]। व्यवहार खुंटले शब्दांचे। क्षीणकर्म स्मरणाचें। श्रवणीं नवचे आकळिला॥८१॥ जेथें मनाची मुरकुंडी। कल्पिला न वचे कडोविकडीं। वृत्ति झाली पैं वेडी। इंद्रियें बापुडीं काय करिती॥८२॥ पुराणें काय करिती तेथ। वेडावला शास्त्रार्थ। तो म्या देवींपुढें तेथ। श्रीरघुनाथ बांधिला॥८३॥ सर्वथा व्यक्ती[4] न येसी। अव्यक्तामाजी लपसी। तो नांवरूपा आलासी। देवीपाशीं मारावया॥८४॥ सर्वातीत रघुनाथ। बंधुसमवेत येथ। म्यां बांधिलासी त्वरित। सुटका निश्चित चिंती पां॥८५॥ विलंब कायसा येथ। जगदंबा क्षुधाक्रांत। स्मर आपुलें कुळदैवत । शिर:पात करूं तुझा॥८६॥

श्रीराम विचारपूर्वक हनुमंताचे स्मरण करतात : ऐकोनियां त्याचें वचन। स्वयें विचारी रघुनंदन। करूं कोणाचें स्मरण। विश्व चिंतन करी माझें॥८७॥ प्राणिमात्रास संकट पडत। तितुके श्रीरामा स्मरत। तेणें पुरती मनोरथ। जग निर्मुक्त श्रीरामें॥८८॥ मज वर्ण व्यक्ति नाहीं। ऐशियातें पाहीं। घाला घालोनियां लवलाहीं। धरिलें कांही चालेना॥८९॥ ऐसें असतां सर्वथा। कोणातें स्मरो मी आतां। विचार करितां रघुनाथा। बुद्धि तत्वतां आठविली॥९०॥ अहंकारें घालोनि घाला। अव्यक्त व्यक्तीं आकळिला। जीवदशेंसीं आणिला। वेगीं बांधला कर्मपाशीं॥९१॥ लटकेंचि क्रियमाण। करवून संचित जाण। वरते ते भोग दारुण। प्रारब्ध जाण तया म्हणती॥९२॥ या त्रिविध कर्माच्या संगतीं। पडिजे जन्ममरणावर्ती। भोगिजेती योनिपंक्तीं। उसंत चित्तीं असेना॥९३॥ तें छेदावया कर्मबंधन। सबळ विरक्त भक्त जन। मी होवोनियां भजन। माझेंचि जाण करिताती॥९४॥ अद्वैतभजनाचा संतोष। होती सर्वभावीं उदास। करोनि कुर्वंडी सर्वस्व। स्वयें सुखास भोगिती॥९५॥ स्वयें स्वसुख भोगिती। उसंत नाहीं अहोरातीं। इतर कर्मबंधीं पडती। तेही येती तया शरण। ९६॥ बाप कृपाळु दीनदयाळ। न म्हणती वेळ अवेळ। दीन देखोनि तत्काळ। करिती सकळ सोडवणें॥९७॥ छेदोनि

शब्दार्थ : १. आश्रय, २. वेगळा, ३. पाहिला जात नाही, ४. उघडकीला.

कामक्रोधांचे बंध। आणि कर्माकर्मांचे भेद। खाणोनि विषयाचा कंद। स्वरूप शुद्ध प्रबोधिती ॥९८॥ देहमात्र झाला कृश। त्यासीं उपचारिती सुरस। देवोनि अर्धमात्रास। जन्ममरणास नासिती ॥९९॥ एवढे असतां दीनोद्धारी। मज दीन केलें इहीं किंकरीं। आतां स्मरोनि झडकरी। करीन बोहरी[1] सकळांची ॥१००॥ ऐसा करोनि निर्धार। सरिसावला रामचंद्र। स्मरला तो हनुमान वीर। रुद्रावतार प्रत्यक्ष ॥१॥

हनुमंत प्रगट होऊन रामांचे पाश तोडतो: ऐकतां श्रीरामवचन। पातला सवेग कपिनंदन। पाश छेदोनियां जाण। रघुनंदन सोडविला ॥२॥ लक्ष्मणासमवेत। श्रीराम केला नित्यमुक्त ॥ अगाध बोध हरिभक्त। नामें निर्मुक्त चराचर ॥३॥ जगा संकट पडलिया जाण। श्रीराम सोडवी आपण। त्या श्रीरामाचें पाशबंधन। निजभक्तें जाण सोडविलें ॥४॥ यालागीं श्रीरघुनाथ। झाला भक्ताचा अंकित। तो ज्याच्या माथां ठेवी हात। त्यासी मुक्त करी श्रीराम ॥५॥ मुक्तोपकार फेडावया। अवतार धरणें रघुराया। धांवतसे लवलाह्यां। राखावया निजभक्तां ॥६॥ अंबरीषाची जन्मकथा। न साहवेचि भगवंता। स्वयें झालाचि अंगीकारिता। उणें भक्ता येऊं नेदी ॥७॥ गज गांजितां पाणियेथडी। वैकुंठीहोनियां उडी। घालोनियां लवडसवडी। गज तांतडी सोडविला ॥८॥ दैत्यें पीडिलें प्रल्हादासी। न साहवे भगवंतासीं। उतटूनियां कोरड्या खांबासी। निजरूपासी दाविलें ॥९॥ दैत्य धरोनि मांडीवरी। चिरियेला नखाग्रीं। भक्ताकाजकैवारी। नरकेसरी प्रल्हाद ॥११०॥ निजभक्तांसीं अटक[2]। जरी पडलें अलोलिक। तितुकेंही रघुकुळटिळक। स्वांगें देख निवारी ॥११॥ ऐसा भगवंताचा निर्धार। म्हणावोनि हरिभक्त निरंतर। न वचकती अणुमात्र। हनुमान वीर अग्रणी ॥१२॥ पुढें देखोनि रघुवीरा। श्यामसुंदर मनोहरा। प्रेमें कांपत थरथरां। अश्रुधारा स्रवताती ॥१३॥ अंगीं रोमांच रवरवित। स्वेदबिंदु डळमळित। कंठी बाष्प पैं दाटत। सद्गदित पैं वाचा ॥१४॥ सत्वभरितें न सांवरत। पडिला चरणावरी मूर्च्छित। श्रीराम अति प्रीतीं उचलित। आलिंगित निजहृदयीं ॥१५॥ आंवरून सत्वावस्था। चरणांवरी ठेऊन माथा। झाला काय विनविता। सावधानता परिसावें ॥१६॥

अप्यग्रणीरात्मभुवां कपींद्रो जगाद देवं जयपूर्वशब्दैः।
निःशेषकर्तुं हि निशाचराणामस्मादृशां वा इह तर्जनात ॥

जो भक्तांमाजी मुकुटमणी। ब्रह्मादिकां अग्रगणी। श्रेष्ठ सकळिकांच्या स्रजनीं[3] आत्मभू[4] म्हणोनि त्यासी म्हणती ॥१७॥ भगवंतापासून ज्ञान। प्राप्त झाला चतुराननं। त्यासही लागले लांछन। स्वकन्या देखोन भुलला ॥१८॥ त्याहीपरीस विशुद्ध। कपिनाथ सावध। अद्वैतज्ञानें अगाधबोध। निजानंद भोगित ॥१९॥ वाती लावोनि पाहतां। दुजें नये दृष्टचे हाता। तेथें कैंची विषयवार्ता। पूज्य तत्वतां आत्मभूसि ॥१२०॥ भक्तांचा तरी मुकूटमणी। सबाह्य वेंचिलें श्रीरामभजनीं। उसंत नाहीं अर्धक्षणीं। मनादिकरणीं सर्वथा ॥२१॥ सर्वप्राण सर्वशक्ती। उसंत नाही श्रीरामभक्ती। तो उभा राहोन मारुती। श्रीरामाप्रती विनवित ॥२२॥

हनुमंत रामांचे स्तवन करितो: करोनि रामनामें भुभुःकार। जयजयकारें गर्जे थोर। श्रीरामासी उत्तर। काय कपींद्र बोलिला ॥२३॥ तूं अकळ लाघवी[5] रघुनाथा। सांडोनियां शरणागता। दीना वानरां समस्तां। कोणा न पुसतां आलासी ॥२४॥ आम्हां गमतसे चित्तें। वंचोनियां निजभक्तांतें। स्वामी येणें केलें येथें। तें कळलें निश्चितें दातारा ॥२५॥ मारिलिया रावणास। पाताळीहीं राक्षस। प्रबळ होतील बहुवस। मागुतें आपणास येणें घडेल ॥२६॥ म्हणोनि श्रीरामा जाण। न मारितां रावण। येथें केलें आगमन। यांची बोळवण करावया ॥२७॥

शब्दार्थ : १. नाश, २. प्रतिबंध, ३. उत्पत्ती करण्यांत, ४. स्वयंभू, ब्रह्मदेव, ५. प्रच्छन्न कारागीर.

राक्षसांचा मनोगन। रावण मारील रघुनाथ। जाईल अयोध्ये त्वरित। आम्हांसी येथे सांडूनी॥२८॥ मग आम्हीं करावें काय। श्रीरामीं भेटी कैंची होय। म्हणोनि रचिले उपाय। तुज पाहें आणावया॥२९॥ तूं अजेय गा सर्वथा । रणीं नातुडसी[1] झुंजतां। आपुले पूर्वजन्म शोधितां। युक्ति तत्वतां आठवली॥१३०॥ जन्मांतरीं निष्कामभजनीं। श्रीरामा तुज केलें ऋणी। यास्तव तिहीं पाशेंकरोनी। तुज बांधोनी आणिले॥३१॥ नाम स्मरतां श्रीरघुनाथ। महापापी उद्धरत। त्या तुज राक्षस बांधित। असंभावित हे वार्ता॥३२॥ इहलोकीं परलोकीं। ऋण फेडावें आवश्यकीं। हें जाणावया या लोकीं। पाश कौतुकीं साहिले॥३३॥ हाचि तुझा निजविचार। श्रीरामा आहे साचार। कीं विचारिलें प्रकारांतर। वानरभार छळावया॥३४॥ तुज राहिलिया गुप्तगतीं। वानरभार काय करिती। कोठें कोठें तुज पाहती। साधन करिती ते कोण॥३५॥ तरी साधावया रघुनंदन। जें आचरावें तें बंधन। साधनीं रिघोन अभिमान। वृथाचि जाण धांवडीत॥३६॥ ऐसें जाणोनि मर्कट। सांडिलें साधनकचाट। नाम स्मरती यथेष्ट। तेणें वाट दाविली॥३७॥ नामीं अनुसरलों तत्वतां। शुद्धि लागली नाम स्मरतां। नामें भेटविलें रघुनाथा। उपाय अन्यथा नेणें मी॥३८॥ ऐसा विनवोनियां रघुनंदन। पुसता झाला वीर वायुनंदन। देई आज्ञा मजलागून। राक्षसनिधन करावया॥३९॥ ऐकोनि कपीचें उत्तर। संतोषला रघुवीर। आलिंगिला पैं सत्वर। अति चतुर तू होसी॥१४०॥ अद्‌भुतशक्ति हनुमंता। वाचे न बोलवे सर्वथा। मज सोडविलें रघुनाथा। बहुत आतां काय बोलूं॥४१॥ पुसणें काय विचार। करीं दुर्जनांचा संहार। वचन ऐकोनि कपींद्र। करूं संहार आदरिला॥४२॥ पूर्वींच अतर्क्य गती। पुच्छाचा वेढा नगराप्रती। करोनि राहिला मारुती। होता निश्चितीं चिन्ह पाहत॥४३॥

हनुमंत रामांच्या आज्ञेने राक्षसांना मारून महिरावणाचा वध करितो : श्रीरामाचें आज्ञापन। लाहोनियां कपिनंदन। करितां झाला कंदन। सावधना अवधारा॥४४॥ श्रीरामाचे पाश बहुत। स्वयेंचि तुटले समस्त। पुढें देखिला कपिनाथ। अति आकांत राक्षसां॥४५॥ एकाचे हातपाय गळाले। एकाचे प्राण कंठी राहिले। एका अधोवात सुटले॥ मुतों लागले उभ्यां उभ्यां॥४६॥ एक आरडती ओरडती। एक पळाले मागुती। एक येती काकुळती। तृणें[2] दांती धरोनी॥४७॥ एकें लागलीं दिक्पुटीं। एकांची रूधली[3] घांटी[4]। तंव अवचित पुच्छाटी। वाजे पाठीं अनिवार॥४८॥ देखोनि सकळांची करुणा। न साहवे महिरावणा। येवोनियां समरांगणा। वायुनंदना पाचारी॥४९॥ येरू ठायींच सावध। श्रीराम प्रभावें विशुद्ध। करूं आदरिलें युद्ध। अति सुबद्ध झोटधरणी॥१५०॥ मिसळले द्वंद्वयुद्धा। मागें न सरती कदा। येरयेरांचिये वधा। करिती सावध येरयेरां॥५१॥ येरयेरां लाविती कळा। परस्परें चेपिती गळा। वर्मीं हाणिती सबळा। आणिती तळा परस्परें॥५२॥ येरयरां हाणिती धके। गुडघे कोंपर तिखट नखें। वोरबडे एकमेकें। अति तवकें काढिती॥५३॥ हनुमान वज्रदेही वीर। अंगावरी न वचे चीर[5]। राक्षसाचें शरीर। नखीं सत्वर विदारिलें॥५४॥ हनुमान विचारी निजचित्तें। विलंब कासया करूं यथें। हाणी आवेशें बहुतें। मुष्टिघातें मस्तकीं॥५५॥ माथां लागतां आघात। मस्तक गेला कोथळांत। भडभडां रुधिर वमित। प्राण निश्चित सांडिला॥५६॥ देखतां श्रीरघुनाथा। हनुमंताचेनि हातें मरतां। चारी[6] देहां हाणोनि लाता। श्रीरामीं तत्वतां मिळोनि गेला॥५७॥ स्थूळ सांडी नश्वर म्हणोन। सूक्ष्म तें मनोजन्य। कल्पनामात्र तें कारण। स्वरूपाभिमान तें चौथें॥५८॥ होतां श्रीरामदर्शन। अप्राप्तता निमाली पूर्ण। नित्यमुक्ततेची निजखूण। बाणली संपूर्ण राक्षसा॥५९॥

---

शब्दार्थ : १. सापडत नाहीस, २. शरण येऊन, ३. बंद झाली, ४. गळा, ५. वस्त्र, ६. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण या चार देहांस.

पृथ्वी सदाचिंतित। माझे माथां श्रीरघुनाथ। विचरत आहे अहोरात। कृतकृतार्थ तेणें मी ॥१६०॥ तेथें स्वरूपाभिमान। राहोनियां कार्य कोण। मग लाजोनियां जाण। झाली लीन श्रीरामीं ॥६१॥ ऐसें पृथ्वींचें अंत:करण पूर्ण। तिचे नांवाचा महिरावण। दृष्टी देखतां रघुनंदन। झाला जाण नित्यमुक्त ॥६२॥ कृपाळु श्रीरघुनंदन। फेडावया पूर्वभजनऋण। येवोनि पाताळा आपण। राक्षस जाण उद्धरिला ॥६३॥ एका जनार्दना शरण। मारियला महिरावण। पुढें वधूं अहिरावण। सावधान अवधारा ॥१६४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां महिरावणवधो नाम त्रिपंचाशत्तमोऽध्याय: ॥५३॥ ओंव्या ॥१६४॥ श्लोक ॥२॥ एवं ॥१६६॥

## अध्याय चोपन्नावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नम: ॥

### अहिरावणाचा वध

पूर्वप्रसंगीं निरूपण। श्रीहनुमंते महिरावण। रणीं मारिला देखोन। अहिरावण क्षोभला ॥१॥ हनुमंताच्या पुच्छावर्ती। राक्षस पडिले नेणों किती। निधडे निधडे वीर पुढती। बळें लोटती संग्रामा ॥२॥ आम्ही निधडे महावीर। राक्षसांचे भार अपार। एक वानर दोघे नर। करूं चकचूर क्षणार्धे ॥३॥

**हनुमंत रामांना आज्ञा देण्याची विनंती करितो:** ऐकोनि राक्षसांच्या युक्ती। विनवी श्रीरामासी मारुती। मज आज्ञापीं श्रीरघुपती। यांची शांती[1] करीन ॥४॥ श्रीराम म्हणे गा पवनात्मजा[2]। सदा यशस्वी तुझिया भुजा। प्राणदाता तूं रघुराजा। कीर्तिध्वजा ब्रह्मांडी ॥५॥ जानकीमनोरथाची वल्ली। प्रतापजीवनें त्वां जीवविली। मज रघुनाथा वेळ पडली। सांभाळिली त्वां एकें ॥६॥ तुझिया उपकारांचे ओझें। मस्तक उचलूं न शके माझें। तुझें कर्तृत्व तुजला साजे। केलीं काजें अतर्क्य ॥७॥ सीताशुद्धीपासूनि कर्में। जीं जीं केलीं तीं तीं दुर्गमें। ऐसें बोलोनि रघूत्तमें। मिठी प्रेमें घातली ॥८॥ श्रीरामें देतां आलिंगन। हनुमान झाला सुखसंपन्न। ब्रह्मप्राप्तीहूनि गहन। समाधान पावला ॥९॥ आतां ऐकें वचन। तुवां मारिला महिरावण। माझा वांटा अहिरावण। कृपा करून मज द्यावा ॥१०॥

**अहिरावणाशी युद्ध करण्याची रामांची इच्छा व हनुमंताच्या खांद्यावर बसून रामलक्ष्मणांची युद्धाची सिद्धता :** ऐसें बोलतां श्रीरघुनाथें। आवेश न धरवे हनुमंतातें। नमस्कारोनि श्रीरामातें। उभयतांतें उचलिलें ॥११॥ उभयस्कंधी दोघेजण। घेवोनि श्रीरामलक्ष्मण। केलें हनुमंते उड्डाण। बळें गर्जोन भुभु:कारें ॥१२॥ तया भुभु:काराच्या घोषें। कित्येक निमालीं राक्षसें। अहिरावणही निजमानसें। धाकें त्रासे कपीच्या ॥१३॥ शेष विष्णु श्रीशंकर। तिन्ही झाले एकत्र। श्रीराम हनुमंत सौमित्र। अति विचित्र शोभती ॥१४॥ असंख्य राक्षसांचें सैन्य। तिहीं वेढिले तिघे जण। युद्ध मांडलें दारुण। सावधान अवधारा ॥१५॥ शक्ति शूळ गदा मुद्गर। फरश पट्टिश लहुडीचक्र। लक्षोनियां नर वानर। शस्त्रें अपार टाकिती ॥१६॥ झणें लागती श्रीरामासीं। म्हणोनि हनुमंत आकाशीं। उडोनि पुच्छें राक्षसांसी। अति आवेशीं ठोकित ॥१७॥ क्षणैक भासे भूमंडळी । क्षणैक भासे नभोभंडळी। पुच्छें राक्षसा रवंदळी। आतुर्बळी करीतसे ॥१८॥ धन्य त्या पुच्छाचा प्रताप। राक्षसांसी सुटला कंप। कंपामाजी मारी थाप । पाडी अमूप[3] पदघातें ॥१९॥ असो यापरी हनुमंतें। रणीं मारिलें राक्षसांतें। तें देखानि श्रीरघुनाथें। आश्चर्यातें

शब्दार्थ : १. नाश, २. मारुती, ३. अनेक.

मानिलें ॥२०॥ अहिरावण जों पाहे नयनीं। पाठिराखा नाहीं कोणी। क्रोधें अधरोष्ठ चावूनी। धांवे रणीं साटोपें ॥२१॥ घेवोनियां धनुष्यबाण। मांडिलें माहेश्वरीं ठाण। अवलोकोनि रघुनंदन। काय आपण बोलत ॥२२॥ जेंवीं होतां सन्निपात। यद्वा तद्वा बडबडत। तैसा लक्षोनि रघुनाथ॥ अहा जल्पत अविचारें ॥२३॥ जेंवी सुरापानी उन्मत्त। वेदश्रुतीतें निंदित। किंवा अधर्मी अदत्त। साधुसंत उपहासी ॥२४॥ तेंवी म्हणे रे रघुनंदना। तूं तंव कौसल्येचा तान्हा। केंवी आलासि समरांगणा। व्यर्थ प्राणां द्यावया ॥२५॥ नरमांसाची प्रीत मोठी। हें रावणें जाणोनि पोटीं। तुज पाठविलें उठाउठीं। आम्हां साठीं आप्तत्वें ॥२६॥ आतां पाहें रणकौतुक। बाणें छेदोनि मस्तक। तोरण[1] देवीच्या संमुख। बांधीन देख निर्धारें ॥२७॥ ऐसें ऐकोनियां वचन। हास्य करोनि रघुनंदन। मी कीटक हीन दीन। गिळीन गगन म्हणतसे ॥२८॥ राक्षसांचा कुळांतक। दाशरथि मी रघुकुळटिळक। युद्ध करितां मज संमुख। क्षणें देख मरशील ॥२९॥ निद्रिस्थ देखोनि केसरी[2]। जंबुक त्याची चेष्टा करी। जिव्हा देखोनि मांसावरी। बळें बाहेरी वोढित ॥३०॥ जागृत होतां कुंजरारी। त्याचा एकचि ग्रास करी। तैसी तुजला झाली परी। दृढ विचारीं मानसीं ॥३१॥ वैर नसतां तुज आम्हांसी। चोरोनि आणिलें दोघांसी। आतां केलें तें पावसी। होई युद्धासीं सावध ॥३२॥ ऐसें बोलतां रघुनंदन। क्रोधें क्षोभला अहिरावण। धनुष्य सज्जोनियां पूर्ण। तीक्ष्ण बाण विंधिले ॥३३॥ तें देखोनि रामचंद्र। बाण सोडोनि दुर्धर। निवारोनि अति सत्वर। शर अपार वर्षला ॥३४॥ श्रीरामाचें बाणजाळ। तेणें व्यापिले नभोमंडळ। अद्भुत राक्षसांचे बळ। तेणें सकळ छेदिलें ॥३५॥ निवारोनि श्रीरामबाण। केलें राक्षसें विंदान। शक्तिवरदाचा तीक्ष्ण। शर दारुण विंधिला ॥३६॥ परम योद्धा श्रीरघुनंदन। क्षणें चूर्ण करितां बाण। शक्तिवरदालागीं मान। स्वयें आपण देतसे ॥३७॥ बाण साहोनि श्रीरघुनाथें। राक्षस विंधिला बाणें शतें। तेणें निवारितां बाण त्यातें। कपाळातें खोंचिले ॥३८॥

अहिरावणाच्या रक्तबिंदूपासून अनेक अहिरावणांची निर्मिती : बाण लागतां भाळावरी। तेथें झाली नवलपरी। रक्तबिंदु व्रणद्वारीं[3]। भूमीवरी पडतांचि ॥३९॥ जितुका रक्तबिंदु पडत। तितुका अहिरावण उठत। तें देखोनि श्रीरघुनाथ। बाण सोडित आवेशें ॥४०॥ वेगळाले शर विंधित। लागतां रक्तबिंदु पडत। पडतांचि अहिरावण घडत। अति अद्भुत मांडलें ॥४१॥ एकापासून झाले शत। शतापासून लक्ष होत। लक्षांचे कोटिपर्यंत। अर्बुदांत कोटीचे ॥४२॥ ऐसें गगन आणि मेदिनी। बाणीं व्यापिलीं अहिरावणीं। ऐसें देखोनियां मनीं। कोदंडपाणी[4] खवळला ॥४३॥ समस्त मिळोनि अहिरावण। गदा परिघ मुसळ बाण। घेवोनियां श्रीरघुनंदन। चहूंकडून वेढिला ॥४४॥ श्रीराम धनुर्वाडा चोखट। तितुकियांचे छेदिले कंठ। कंठ छेदितां उद्भट। चालिले लोट रक्ताचे ॥४५॥ तया रक्ताचे मागुती। रूपें घडती नेणों किती। गदापरिघ मुसळ हातीं। घेवोनि धांवती युद्धासीं ॥४६॥ धन्य तयांचे तपश्चरण। धन्य शिवाचे वरदान। प्रतापी रघुनंदन। अणुप्रमाण ढळेना ॥४७॥ लावोनियां अग्निबाण। करोनि रक्तांचे शोषण। त्यांचा घ्यावा यासी प्राण। अशक्य कोण श्रीरामा ॥४८॥ सहज संकल्पाची प्रौढी। रची ब्रह्मांडांच्या कोडी। घडोनि सर्वेचि मोडी। घडी विघडी संकल्पें ॥४९॥ तेथें बापुडें अहिरावण। मारावया नवल कोण। परंतु शिवाचें वरदान। रघुनंदन प्रतिपाळी ॥५०॥ शुद्ध ग्रंथाचा ग्रंथार्थ। पूर्णब्रह्म श्रीरघुनाथ। हाचि जाणावा भावार्थ। त्याचें सामर्थ्य विशेष ॥५१॥ लीलामात्रें अहिरावण। मारावयासी अशक्य कोण। परंतु भक्ताचें महिमान। स्वयें आपण वाढवी ॥५२॥

---

शब्दार्थ : १. नारळ, इत्यादिकांची देवादिकांवर बांधितात ती माळ, २. सिंह, ३. क्षतापासून, ४. धनुर्धारी.

अहिरावणाच्या वधानुवृत्तीं[1]। देखोनियां अपार व्यक्ती। आश्चर्य करोनि रघुपती। काय चित्तीं विचरी॥५३॥ बाण सोडितां रिपुवधार्थी। वैरी अधिकचि वाढती। परम अद्भुत वर्तलें क्षितीं। काय याप्रती करावें॥५४॥ मारितां न मरे एक जण। चिंतावला रघुनंदन। उगाचि राहिला आपण। घाय दारुण टाळित॥५५॥ श्रीरामें न सोडितां बाण। युद्धा पेटले अहिरावण। घाय हाणिती अवघे जण। श्रीरघुनंदन टाळित॥५६॥

हनुमंत रामाज्ञाने मकरध्वजाच्या मातेला उपाय विचारतो : ऐसें देखोनि हनुमंत। परम झाला चिंताक्रांत। उपाय कीजे कोण येथ। श्रीरघुनाथ वांचवावया॥५७॥ येथें न चले रणव्युत्पत्ती। येथें न चले प्रतापशक्ती। मारितां अधिक उद्भवती। युक्ति कोणती करावी॥५८॥ किंवा अवघे अहिरावण। पुच्छप्रतापे आकळून। इतुकियांचे घेऊं प्राण। कळ लावून कंठासीं॥५९॥ ऐसें विचारितां मारुती। युक्ती आठवली निजचित्तीं। जाऊन पुसूं पुत्राप्रती। तो हें निश्चितीं सांगेल॥६०॥ ऐसें चिंतोनियां जाण। केलें श्रीरामाचें स्मरण। हनुमंतें करोनि उड्डाण। पुत्रसदन पावला॥६१॥ तेणें नमस्कारिलें ताता। येणें सांगितलें वृत्तांता। मकरें पाचारिली माता। समूळ वार्ता ते सांगे॥६२॥

मकरध्वजाच्या मातेचे उपायकथन: मगरी म्हणे प्रतापरुद्रा। वचन ऐकें गुणसमुद्रा। संकट पडिलें श्रीरामचंद्रा। त्या परिहारा सांगेन॥६३॥ धर्म पत्नी अहिरावणा। तिचें निजनाम चंद्रसेना। तुम्ही जावोनि तिच्या सदना। तियेसी जाणा पुसावें॥६४॥ पतिव्रता ते सत्यवचनी। परम साध्वी तपस्विनी। तियेसी पुसतां तत्क्षणीं। तुजलागोनी सांगेल॥६५॥ कैसें सांगेल भ्रतारमरण। ऐसी आशंका घेईल मन। तरी तेविषयीं निरूपण। सावधान अवधारा॥६६॥ नागपाशीं श्रीरघुनंदना। बांधोनि आणितां राजसदना। तेथें आली चंद्रसेना। मनमोहना देखिलें॥६७॥ सुंदर देखोनि रघुपती। चंद्रसेनेची मनोवृत्ती। श्रीरामीं वेधिली निश्चितीं। ऐसा पति असावा॥६८॥ श्रीरामीं गुंतलें तन मन। नाठवेचि प्रपंचस्फुरण। कांत व्हावा रघुनंदन। ऐसें जाण वांछित॥६९॥ मी अनुचरी[2] तियेची जाण। तेथें माझें गमनागमन। तिचे हृद्गत कळलें पूर्ण। तैंपासून मजलागीं॥७०॥ श्रीरामीं गुंतली वासना। त्यालागीं सांगेल कांतमरणा। एतद्विषयीं अनुमाना। पवननंदना न करावें॥७१॥

अहिरावणपत्नी चंद्रसेनेच्या सदनात हनुमंताचे आगमन : ऐसें ऐकोनियां वचन। हनुमान उल्लासला पूर्ण। म्हणे कृपाळु रघुनंदन। मजलागून तुष्टला॥७२॥ स्मरोनि श्रीरामपायांसी। तेथोनि उडाला वेगेंसी। आला चंद्रसेनेपासीं। देखोनि तियेसी ध्यानस्थ॥७३॥ जैसा श्रीराम देखिला नयनीं। तैसा बिंबला अंतःकरणी। तेणें ध्यासें श्रीरामध्यानीं। बाह्यकरणीं तटस्थ॥७४॥ डोळस सुंदर घनसांवळा। कांसे कसिला सोनसळा। आपाद वैजयंती माळा। कटिमेखळा शोभत॥७५॥ मुकुटकुंडलें शोभायमान। श्यामसुंदर राजीवनयन। वदन सर्वानंदसदन[3]। कुंदरदन[4] साजिरा॥७६॥ सुरेख भ्रकुटी शुकनासिक। भाळीं कस्तूरीची रेख। ऐसा देखोनि रघुकुळटिळक। लागली देख समाधी॥७७॥ कोटिमदनांचें सांडणें। श्रीरामावरोनि ओंवाळणें। चंद्रसेना आपले मनें। भोगी तेणें तटस्थ॥७८॥ जैसा साधक हृदयभवनीं। आत्मस्वरूपातें लक्षूनी। तटस्थ राहे सहजासनीं। तेंवी कामिनी देखिली॥७९॥ नातरी देखोनि सर्पासी। तटस्थता जेंवी अजेसीं[5]। तेंवी देखोनि श्रीरामासी। चंद्रसेनेसीं समाधी॥८०॥ हनुमान पाहे आत्मज्ञानीं। तंव ते वेधली श्रीरामध्यानीं। म्हणे धन्य इयेची जननी। इयेलागूनी प्रसवली॥८१॥ राक्षसयोनीमाजी जनन। आणि इयेसी श्रीरामध्यान। श्रीरामाचें महिमान। होतां दर्शन समाधि॥८२॥ अति चंचळत्वें

शब्दार्थ : १. पुनः पुनः मारण्याने, २. दासी, ३. संपूर्ण आनंदाचे घर, ४. कुंद फुलासारखे दांत असलेला, ५. शेळीला.

मन विकारी। एकाग्र राहोनि निर्विकारी। त्याचिया भाग्याची थोरी। मज वैखरीं न वर्णवे ॥८३॥ मनें गोंविलें साधकांतें। मनें भ्रमविलें ज्ञानियातें। मनें नाडिलें योगियातें। तापसातें दंडिलें ॥८४॥ ऐसें जें मन विकारवंत। चंद्रसेनेनें नेमस्त। करोनी हृदयीं श्रीरघुनाथ। असे भोगित स्वानंदें ॥८५॥ धन्य इयेचा भावार्थ। धन्य इयेचा संचितार्थ। धन्य इथेचा परमार्थ। श्रीरघुनाथदर्शनें ॥८६॥ ज्याचे हृदयीं श्रीरघुनाथ। त्याचें भाग्य अति समर्थ। ऐसें बोलतां हनुमंत। सद्गदित जाहला ॥८७॥ आत्मप्रत्ययाची[१] गोष्टी। ऐकतां हर्ष होय पोटीं। नातरी प्रेमळ देखोनि दृष्टी। पडे मिठी प्रेमळा ॥८८॥ वस्तु देखोनि आवडती। कोणा एका उपजे प्रीती। तैसें देखोनियां सती। झाला मारुति तटस्थ ॥८९॥ हनुमंताची ध्यानमूर्ती। ब्रह्मानंदें श्रीरघुपती। ते देखोनि तिचे चित्तीं। झाला मारुति सद्गद ॥९०॥ देहीं श्रीरामाचें उदेलें। नयनीं प्रेमाश्रु पातले। स्वेदकंपादि दाटले। पूर्ण झाले मनोरथ ॥९१॥ तेणें विसरला मीतूंपण। विसरला स्थूल लिंग देह कारण। विसरला विश्व[२] तैजस[२] प्राज्ञ[२]। महाकारण[३] विसरला ॥९२॥ विसरला अवस्था उन्मनी[४]। परमानंद कोंदला मनीं। नेत्र राहिले उन्मळोनी। जनीं वनीं श्रीराम ॥९३॥ हनुमान विसरला देहस्फूर्ती। हृदयीं कोंदला श्रीरघुपती। ऐसें ऐकोनि निश्चितीं। आज्ञेपिती जरी श्रोते ॥९४॥ दाशरथि श्रीरघुनंदन। पाहतां त्याची मूर्ति सगुण। त्याचें एवढे महिमान। फळ तें कोण निर्गुणाचें ॥९५॥ परवस्तूची होतां प्राप्ती। जैसी तियेची फळश्रुती। ते त्वां सगुणध्यानस्थितीं। तैसी निश्चितीं स्थापिली ॥९६॥ ऐसी श्रोतियांची युक्ती। ऐकोनि वक्ता करी विनंती। सावध होवोनिया चित्तीं। यथानिगुतीं ऐकावें ॥९७॥ अणूमाजी ब्रह्म पूर्ण। हें तों प्रसिद्ध वदे वचन। कांहीं रिते नाहीं जाण। जग संपूर्ण परब्रह्म ॥९८॥ आपुलें स्थान न सोडून। कार्यकारणीं होय उत्पन्न। मायामहत्तत्वादि त्रिगुण। ब्रह्मापासून जाहले ॥९९॥ धरणी आदि पंचभूतें। तेथूनि पावलीं जननातें। परंतु मुकलीं ब्रह्मातें। हें कोणातें न बोलवे ॥१००॥ सुवर्णापासून नग[५] जाला। तरी सुवर्णत्वा काय मुकला। त्यासी अधिक लाभ झाला। नाम पावला अलंकार ॥१॥ तेंवी जें जें आलें व्यक्ती। तें तें ब्रह्मरूप निश्चितीं। मग पूर्णावतार श्रीरघुपती। ब्रह्ममूर्ति कैंवी नव्हे ॥२॥ अणुही परी ब्रह्मत्वेंसीं। कांही नसतां प्रतापासी। हा तरी प्रतापाची राशी। ब्रह्मत्व यासीं कैंवी नसे ॥३॥ ज्याचे गृहीं सर्व संपत्ती। आणि स्वामित्व लोकांप्रती। भगवद्गीतेंत श्रीपती। माझी विभूति ते म्हणे ॥४॥ ऐसिया राजियांच्या चळथा[६]। नित्य सेविती श्रीरघुनाथा। ज्याचा चतुरानन खेळता। वंदी माथां शंकर ॥५॥ श्रीराम चूडामणि[७] रघुवीर। ज्यासी वंदिती नर सुरवर। पूर्णब्रह्म हा निर्धार। कैंवी साचार न मानावा ॥६॥ आणीकही दुसरा अर्थ। रावणभयें सुर समस्त। क्षीरसागरा जावोनि त्वरित। रमाकांत प्रार्थिला ॥७॥ त्यांचे ऐकोनियां स्तवन। शेषशायी श्रीनारायण। स्वयें झाला रघुनंदन। हें तों वचन वाल्मीकी ॥८॥ नारायण तो श्रीरघुनंदन। शेष तोचि लक्ष्मण। शंख चक्र भरत शत्रुघ्न। वाल्मीकवचन प्रसिद्ध ॥९॥ पूर्णब्रह्म श्रीनारायण। तोचि झाला श्रीरघुनंदन। झाला म्हणणें हेंही गौण। तोचि आपण प्रकटला ॥११०॥ जोचि देखिला वाराणसीं। तोचि भेटला अन्य देशीं। तरी काय भेद झाला त्यासीं। देशकाळासीं भेदत्व ॥११॥ जैसा होता शेषशयनीं। तोचि झाला अयोध्याभवनीं। पूर्णब्रह्मत्व रघुनंदनीं। निश्चियेंकरोनी पैं असे ॥१२॥ सगुण असतां श्रीनारायण। त्यासी ब्रह्मत्व कैसेन। ऐसें म्हणती त्यांचें ज्ञान। अति अज्ञान जाणावें ॥१३॥ सगुण मानिती श्रीहरीतें। त्यांचें ज्ञान असो परतें। त्याहून आहे म्हणतां वरतें। सरतें पुरतें अज्ञान ॥१४॥ असो हे भेदाची मात। पूर्णब्रह्म श्रीरघुनाथ। स्वलीला अवतार धरित। नाना दावीत चरित्रें ॥१५॥ ब्रह्म नसतां रघुनंदन।

---

शब्दार्थ : १. आत्मानुभवाची, २. जागृती, स्वप्न, सुषुप्ती अवस्थांचे अभिमानी, ३. चौथा देह, ४. पाचवी अवस्था, ५. अलंकार, ६. समुदाय, ७. श्रेष्ठ.

तरी कैसेनि तरती पाषाण। जीवनात्मा श्रीराम आपण। स्वसत्तें जाण तारिले ॥१६॥ आणीक दुसरा चमत्कार। लंकेपुढे घोरांदर। होतां मरती निशाचर। आणि वानर उठती ॥१७॥ समुद्रीं पाषाण तरती। हे ईश्वरत्वाची प्रतीती। आत्मत्वाची दुजी ख्याती। कपि वांचती संग्रामीं ॥१८॥ बाण फिरोनि भातां रिघती। हे व्यापकत्वाची प्रतीती। आणि स्वकर्मत्वाची ख्याती। कपि मारिती राक्षसां ॥१९॥ हेचि आशंका पार्वतीसी। सीता होवोनि वनासीं। छळो आली श्रीरामासीं। श्रीरामें तिसी ओळखिलें ॥१२०॥ ब्रह्म नसता श्रीरघुपती। तरी कैसेनि ओळखता पार्वती। सर्वज्ञत्वाची हे प्रतीती। श्रीराम निश्चितीं परब्रह्म ॥२१॥ ऐसें ईश्वरत्व आत्मत्व सर्वज्ञत्व। व्यापकत्व आणि सर्वकर्तृत्व। त्यासीं न मानितां ब्रह्मत्व। अज्ञानत्व म्हणणें यासी ॥२२॥ सच्चिदानंद आत्माराम। तो श्रीराम पूर्णकाम। ज्याचें सहज घेतां नाम। उडे परम अज्ञान ॥२३॥ त्याचें भजन तेंचि साधन। त्याचें स्मरण तेंचि मनन। त्याची प्राप्ति तोचि जाण। ब्रह्म पूर्ण त्रिसत्य ॥२४॥ ऐसियापरी श्रीरघुनंदन। पूर्ण ब्रह्म सनातन। त्यांचें हृदयीं करितां ध्यान। झाला लीन हनुमंत ॥२५॥ ऐसें ऐकोनियां वचन। सुखावले श्रोतेजन। म्हणती वक्ता विचक्षण। समाधान पैं केलें ॥२६॥ पूर्णब्रह्म श्रीरघुनंदन। आम्हां ठावें असे पूर्ण। तुझें पहावयासी ज्ञान। केला प्रश्न कौतुकीं ॥२७॥ सद्गुरूकृपाघनतुषारें[१]। आनंदविलीं मनमयूरें। झालें समाधान पुरें। चालवीं त्वरें कथेसी ॥२८॥ श्रोतियांसी करोनि नमन। वक्ता म्हणे सावधान। समाधि पावला हनुमान। पुढील कथन अवधारा ॥२९॥ सर्व वृत्तींचा निरास। करोनि स्वरूपीं सावकाश। लीन असतां हनुमंतास। श्रीरामास अति चिंता ॥१३०॥ स्वरूपीं वेधला वायुकुमर। झाला मत्कार्याचा विसर। ऐसें जाणोनि रघुवीर। स्फुरणरूपेंसी करी सत्वर सावध ॥३१॥ श्रीराम चैतन्याचें चित्त। श्रीराम आनंदाचें जीवित। स्फुरणरूपेंसी प्रकटत। सावध करित हनुमंता ॥३२॥ महाकारणीं प्रवेशोन। सावध करी रघुनंदन। येतां वृत्तीवरी[२] हनुमान। झालें स्मरण कार्याचें ॥३३॥ अवस्था जिरवूनि उदरीं। हनुमंत विचारी अंतरीं। श्रीराम सांडोनि संगरीं। काय करीं मी येथें ॥३४॥ आलों वर्म पुसावयासी। तें स्मरण नाहींच मानसीं। काय गुंतलों समाधीसी। वेगीं कार्यासी करावें ॥३५॥ श्रीराम सर्वांसी बुद्धिदाता। श्रीराम चैतन्या चेतविता। तेणें चेतविलें हनुमंता। पुढील कथा अवधारा ॥३६॥

हनुमंताकडून चंद्रसेना सावध होऊन प्रश्न करते: हनुमान उघडोनि पाहे नयाना। तंव ते ध्यानस्थ चंद्रसेना। करोनि हरिनामें गर्जना। टाळी जाणा पिटिली ॥३७॥ ऐकतां हनुमंताची टाळी। तिची उघडली कर्णटाळी। सावध होवोनि नेत्रकमळीं। पाहे बाळी सचकित ॥३८॥ म्हणे नवल कैसें झालें। कैंचें वानर येथें आलें। यासी पुसोनि पाहों वहिलें। नमन केलें तंव तेणें ॥३९॥ देखोनि बोले राक्षसभार्या। कपि आलासी कोण्या कार्या। तेजें दिससी समान सूर्या। वानरवर्या[३] सांगावें ॥१४०॥

हनुमंताचे वृत्तांतकथन व वर्मउपायाची याचना: हनुमंत म्हणे चंद्रवदनें। शुभलक्षणे कुंदरदने। गुणचातुर्यसौंदर्यसदने[४]। माझीं वचनें परिसावीं ॥४१॥ रावणें निजसामर्थ्येंसीं। बंदीं घातलें देवांसी। सुरवरीं प्रार्थिलें श्रीहरीसी। अति करुणेसी भाकूनी ॥४२॥ त्यांचे ऐकोनियां स्तवन। स्वयें अवतरे नारायण। सूर्यवंशी श्रीरघुनंदन। ब्रह्म पूर्ण प्रकटला ॥४३॥ त्याचा बंधु तो लक्ष्मण। तोचि जाण सहस्रवदन[५]। शंखचक्रावतार पूर्ण। भरतशत्रुघ्न जाणावे ॥४४॥ पुढें दशरथाचे वचनें। वना पातला श्रीरघुनंदन। सीता हरिली दशाननें। कपटभावेंकरोनी ॥४५॥ तिची करावया सोडवण। मेळवोनि वानरसैन्य। लंके आला श्रीरघुनंदन। समुद्रीं पाषाण

शब्दार्थ: १. सद्गुरुरूप दयामेघाने वृष्टी करून, २. देहभानावर, ३. वानरश्रेष्ठ (मारुते). ४. गुण, चातुर्य, व सौंदर्य यांचे घर ५. शेष.

घालोनी ॥४६॥ वानरीं करोनि घोरांदर। रणीं मारिले निशाचर। रावणाचे बंधुपुत्र। श्रीरामें समग्र मारिले ॥४७॥ तेणें दुःखें दशानन। अहिमही दोघे जण। त्यांसी जाणवी वर्तमान। साह्य पूर्ण करावें ॥४८॥ तिहीं ऐकिलें वचन। निद्रिस्थ श्रीरामलक्ष्मण। येथें आणिले चोरोन। त्यांचें हवन करावया ॥४९॥ ऐसें कळतां मज हनुमंता। वेगीं धांवोनि तत्वतां। केलें महिरावणाच्या घाता। श्रीरघुनाथा सोडविलें ॥१५०॥ हें देखोनि अहिरावण। दुःखे क्षोभला दारुण। पडखळोनि[१] रघुनंदन। दुर्धर रण मांडिले ॥५१॥ दुर्धर रणयोद्धा श्रीराम। केला अद्भुत संग्राम। तेथें कौतुक झालें परम। न कळे वर्म राक्षसीं ॥५२॥ बाण लागतां शत्रुशरीरीं। रुधिर पडतां पृथ्वीवरी। बिंदुपासाव होती वैरी। नवलपरी हे माते ॥५३॥ चंद्रसेना सत्यवचनी। ऐसें ऐकोनियां कानीं। वर्म पुसावयासी जननी। तुजलागोनी मी आलों ॥५४॥ वैरी कैसेनि उद्भवती। त्यांची कैसी हो शांती। हें मज सांगावें निश्चितीं। श्रीरघुपतिसुखार्थ ॥५५॥ रणसंकटीं पडिला श्रीराम। त्याचा जेणें होय निगम[२]। ऐसें सांगावें निजवर्म। मनोधर्म हा माझा ॥५६॥ निजधर्माचें संरक्षण। करावया साधूचें पाळण। मारावया दुष्टजन। रघुनंदन अवतरला ॥५७॥ श्रीराम भक्तांचें माहेर। श्रीराम ज्ञानाचें जिव्हार। श्रीराम विश्वाचा आधार। पूर्णावतार श्रीराम ॥५८॥ श्रीराम मुनिजनांचे ध्यान। श्रीराम योगियांचें भजन। श्रीराम सुरांचें देवतार्चन। मदनमोहन श्रीराम ॥५९॥ श्रीरामाऐसें निधान[३]। राक्षसीं घेतलें वेष्टून। त्यासीं उपाय कीजे कवण। कृपा करून सांगावा ॥१६०॥ ऐसें बोलतां हनुमंता। चंद्रसेनेसीं परमावस्था[४]। संकट ऐकोनि श्रीरघुनाथा। झाली तत्वतां विव्हळ ॥६१॥ श्रीराम सर्वांगसुकुमार। सुवर्णतनु सुंदर। राक्षसांचे शस्त्रप्रहार। केंवी रघुवीर साहेल ॥६२॥ आणि असावा ऐसा भर्ता। पूर्वसंकल्प चित्तीं होता। ऐसिया बुद्धीची विकळता। सांगे तत्वतां पतिमरण ॥६३॥ म्हणे ऐकें श्रीरामदूता। परमसाधु परम भक्ता। माझिया पुरविसी मनोरथा। तरी मी तत्वतां सांगेन ॥६४॥ साच ऐकोनियां वचन। हृदयीं हर्षला हनुमान। म्हणे सांगसी मजलागून। तें पूर्ण करीन मी ॥६५॥ चंद्रसेना म्हणे त्यातें। सत्य मिथ्या न कळे मातें। जरी तूं देसील भाकेतें[५]। तरी मी तूते सांगेन ॥६६॥ आपुला साधावया कार्यार्थ। भाक देवोनि हनुमंत। म्हणे काय तो सांग त्वरित। मनोरथ मी कर्ता ॥६७॥

चंद्रसेनेचे हनुमंताला अटीसह उपायकथन: हर्षे बोले चंद्रसेना। म्हणे ऐक पवननंदना। म्यां भोगावें श्रीरघुनंदना। मुख्य वासना हे माझी ॥६८॥ कांत[६] व्हावा श्रीरघुपती। ऐसी वांच्छा आहे चित्तीं। पूर्ण करीं तूं मारुती। म्हणोनि सती वंदित ॥६९॥ कांत व्हावा श्रीरघुनंदन। म्हणोनि सांगतें पतिमरण। अवश्य हनुमंतें बोलोन। पुसे फिरोन ते गोष्टी ॥१७०॥ मग म्हणे गा ऐकें सत्य। अहिरावण जो माझा कांत। तेणें तप केलें अद्भुत। तोही वृत्तांत अवधारीं ॥७१॥ लोहकंटकीं एकनिष्ठ। येणें रोवोनि अंगुष्ठ। तप केलें अति उत्कृष्ट। श्रीनीळकंठप्रीत्यर्थ ॥७२॥ प्रसन्न होवोनि त्रिनयन[३]। तेणें दिधलें वरदान। रक्तबिंदु पडतां जाण। अहिरावण जन्मावे ॥७३॥ भ्रमराळी[७] शिवकंधरीं[८]। तेचि धांवोनि एकसरीं। पाताळअमृत लवकरीं। आणोनि रुधिरीं घालिती ॥७४॥ तेणें उठती अहिरावण। हें हनुमंता सत्य जाण। असत्य न वदे माझें वदन। पुढील कारण करावें ॥७५॥

हनुमंताचे उड्डाण व भ्रमरसंहार: ऐसें ऐकतां हनुमंत। चंद्रसेनेतें वंदित। मज वोळला श्रीरघुनाथ। असे डुल्लत निजप्रेमें ॥७६॥ करोनियां श्रीरामस्मरण। केलें हनुमंतें उड्डाण। वेगीं पातला पाताळभुवन। जेथें स्थान अमृताचें ॥७७॥ सादरें पाहे हनुमंत। तंव भ्रमरीं झांकिलें अमृत।

शब्दार्थ : १. आवेशाने चालून येऊन, २. सुटका, ३. अपूर्व ठेवा, ४. अत्यंत दुःख, ५. शपथ, ६. पती, ७. भ्रमरपंक्ती, ८. शिवमस्तकी. (कंधर = मान)

म्हणे सतीचें वचन सत्य। वर्म निश्चित सांगितलें ॥७८॥ त्या अमृतरुद्रातें रक्षण। लोकपाळ ठेविले जाण। येरें करोनि आंगवण। मारिले पूर्ण निमेषें ॥७९॥ पुढें येतां वायुसुत। भ्रमर देखिले अमृत नेत। एकामागें एक पळत। त्वरान्वित अति वेगें ॥१८०॥ तेणें क्षोभला हनुमंत। थापा हाणोनि समस्त। अवघ्यां करोनि प्राणांत। निर्जीवित पडिले ॥८१॥ कोणी उरले पांच सात। ते पळाले भयभीत। मुख्य जो कां भ्रमरनाथ। जाणवीत तयासी ॥८२॥ तो अति उग्र स्थूळशरीरी। मेरु भ्रमरमाळेवरी। गरुडाऐसा फडत्कारीं। आला सत्वरी धांवोनी ॥८३॥ वज्रप्राय चंचु कठिण। हाणि हनुमंता धांवोन। येरें दोनी पक्ष धरोन। पाडिला जाण भूतळीं ॥८४॥ पाय देवोनि वक्षाप्रती[1]। पक्ष उपडितां दोहीं हातीं। येरु येवोनि काकुलती। म्हणे मारुति वांचवीं ॥८५॥ तुझिया उपकारा उत्तीर्ण। मी एकदां होईन जाण। जेव्हां माझें करिसी स्मरण। मी पावेन ते समयीं ॥८६॥ म्हणसील भ्रमर हीन दीन। होसी उतराई कैसेन। तरी कीटक समुद्रा उत्तीर्ण। झालें म्हणून ऐकिजे ॥८७॥ ऐसें ऐकोनि दीनवचन। कृपें कळवळिला हनुमान। त्यासी भाकें गोंवून। दिल्हा सोडून भ्रमरेंद्र ॥८८॥ तेथें बैसोनि हनुमंत। स्वेच्छा प्राशिलें अमृत। येरीकडे श्रीरघुनाथ। काय करित तें ऐका ॥८९॥

**आकाशवाणीने रामांना निर्दालक बाण सोडण्याची सूचना :** सज्जोनियां चापशर। युद्ध मांडिले घोरांदर। बाणीं निवटी राक्षसभार। श्रीरघुवीर दृढ योद्धा ॥१९०॥ तंव गर्जली आकाशवाणी। बाण सर्ज्जी कोदंडपाणी[2]। तुझे शत्रु तुझिया बाणीं। येच क्षणीं निमतील ॥९१॥ शत्रु जेणें पावती जनन। तया उपाया पडिलें खान[3]। अमृतवृष्टी सरली जाण। विजयी पूर्ण तूं होसी ॥९२॥ ऐसें अशरीरिणीचें[4] वचन। ऐकोनि श्रीरघुनंदन। चापीं सज्जी अग्निबाण। घ्यावया प्राण शत्रूचा ॥९३॥ सबीज मंत्रें आव्हानिला। सुसाटध्वनि शर सूटला। शत्रुकाननीं लागला। निघती ज्वाळा धडधडां ॥९४॥ बाणें शोषोनि रुधिर। अवघे करोनि एकत्र। कंठ छेदिले सर्वत्र। निमेषमात्र न लागतां ॥९५॥ जितक्या झाल्या होत्या व्यक्ती। तितक्यांची केली शांती। धन्य धनुर्वाडा रघुपती। निमेषगती न लागतां ॥९६॥

**अहिरावणाचा वध:** मुख्य जो कां अहिरावण। तयाचें शिर छेदून। बाणें वंदोनि रघुनंदन। निघे परतोन भात्यांत ॥९७॥ समुद्रीं नाना तरंग उठती। वायु त्यांची करी शांती। तेंवी निजबाणें श्रीरघुपती। राक्षसव्यक्ती निवटितां ॥९८॥ नातरी मनाचे संकल्प। साधक करी निर्विकल्प। तेंवी अहिरावण अमूप। रविकुळदीपक संहारी ॥९९॥ जेंवी नाना भूतकृती। असतां नाशे ब्रह्मसंपत्ती। तेंवी राक्षसांच्या व्यक्ती। श्रीरघुपति संहारी ॥२००॥ भेदवाद्यांचे[5] शब्दार्थ। जेंवी वेदांत दूषित। तैसियापरी श्रीरघुनाथ। संहारित राक्षसां ॥१॥ जेंवी उगवतां सूर्यकिरणें। लोपोनि जाती तारांगणें। ऐसियापरी श्रीरघुनंदनें। रणीं मारणें शत्रूंतें ॥२॥ क्रोधांवाचून संहार। काम नसतां कामाचार। लोभावांचून परिवार। श्रीरघुवीर संपादी ॥३॥ असो त्याची अतर्क्य गती। तोचि जाणे निश्चितीं। किंवा त्याचे भक्त जाणती। येरांप्रती टकमक ॥४॥ ऐसियापरी श्रीरघुनंदन। मारोनियां अहिरावण। विजयी झाला संपूर्ण। पुढील कथन अवधारा ॥५॥ अहिरावण पडिला रणीं। ऐसें देखोनियां नयनीं। पळों लागल्या राक्षसश्रेणी[6]। जीव घेवोनि श्रीरामभयें ॥६॥ धर्मयोद्धा श्रीरघुनंदन। पळत्यावरी न घाली बाण। रणीं उभा रणप्रवीण। सहलक्ष्मण स्वानंदे ॥७॥

**हनुमंताचे राक्षससैन्यांत आगमन व राक्षसांची दाणादाण :** येरीकडे श्रीहनुमंत। उड्डाण करोनियां त्वरित। आला राक्षससैन्यांत। नाम गर्जत श्रीरामाचें ॥८॥ पुच्छ वाढिविलें थोर। आवर्त[7]

शब्दार्थ : १. छातीवर, २. हे धनुर्धारी, ३. शून्य, ४. आकाशवाणीचे, ५. द्वैतवाद्यांचे, ६. राक्षसांचे समुदाय, ७. वेढा.

घालोनि चौफेर। राक्षसांसी केला मार। अति दुर्धर तो ऐका॥९॥ गज धरोनि हस्तकीं। हाणी गजाचे मस्तकीं। रथ घेवोनि एकाएकीं। बळें टाकी रथावरी॥२१०॥ मोठा युद्धा आवेश। झोडी राक्षसेंराक्षस। पायीं मारिले बहुवस। सावकाश रणरंगीं॥११॥ एक आकाशीं झुगारिले। एक सागरीं बुडविले। एक पायींच तुडविले। एक झोडिले कराघातें॥१२॥ पुच्छ पसरिलें दुर्धर। राक्षस आकळोनि समग्र लोहार्गळा[1] घेवोनि थोर। केला चूर अस्थींचा॥१३॥ भयें भ्रमविलें निशाचरां। पळों लागले सैरावैरां। एकीं घेवोनि भेदरा[2]। रणीं थरथरां कांपती॥१४॥ एक पळती आकाशांत। भला सांपडला पंथ। ऐसें वदतां पुच्छकेत। पायीं धरित अतर्क्ये॥१५॥ पुच्छ नव्हे हा काळकेत। लपोनि राहतां विवरांत। पुच्छ पातलें उमगित। ओढोनि काढित बाहेरी॥१६॥ ऐसी राक्षसां करोनि बोहरी[3]। पुच्छें प्रवेश करोनि नगरीं। हनुमान मर्कटचेष्टा करी। नवलपरी ते ऐका॥१७॥ नगरीं वागती नगरलोक। तेथें पुच्छ आलें देख। पायीं धरोनि एकाएक। बळें सकळिक आपटिले॥१८॥ पळोनि जातां निजगृहांत। पुच्छ पातलें अकस्मात। महानाटकी हनुमंत। राक्षसांत मांडिला॥१९॥ पुच्छ घालितां नासिकांत। राक्षस सटसटां शिंकत। नाकीं वदनीं सळसळित। बुळबुळित बृहतीमाजी॥२२०॥ अधोद्वारा दाटित। वदनद्वारीं काढित। तेणें राक्षसां प्राणांत। कळकळित कपिभयें॥२१॥ नगरीं मांडिला आकांत। राक्षस ठायी ठायीं लपत। सर्वदेखणा[4] हनुमंत। पुच्छ धाडित त्या ठाया॥२२॥ सर्वभूतीं श्रीरघुनाथ। त्यासी भजतां हनुमंत। झालें सर्वज्ञत्व प्राप्त। जाणे समस्त विश्वहृदय॥२३॥ सर्वभूतीं श्रीरघुनाथ। ऐसें जाणोनि हनुमंत। राक्षस मारिले किमर्थ। तोही वृत्तांत अवधारा॥२४॥ श्रीराम सर्वांचा हृदयस्थ। हृदयीं असोनि साक्षिभूत। सर्वी साक्षित्वें नांदत। नव्हे लिप्त पापपुण्य॥२५॥ घटीं[5] रविबिंब देखिलें। आणि घटासी फोडिलें। तरी काय सूर्यातें भेदिलें। बोलतां बोल मानेना॥२६॥ सहज फोडितां तरंगासी। काय फोडिलें समुद्रासी। तैसें मारितां इतरांसी। श्रीरामासी काय लागे॥२७॥ आणि प्रवृत्तिशास्त्रसंमत[6]। देवद्रोही मदोन्मत्त। ब्रह्मद्वेषी अधर्मरत। त्यांचा घात करावा॥२८॥ आणिकही दुसरा अर्थ। मुक्त जें जें कर्म करित। तें तें त्यासी अबाधत। न लागे निश्चित पापपुण्य॥२९॥ गोकुळामाजी श्रीअनंतें। भोगिलें नाना योषितातें[7]। पाप कोणतें जडलें त्यातें। हेंचि निश्चितें सांगावें॥२३०॥ तयाचपरी श्रीहनुमंतें रणीं मारिलें राक्षसांतें। नाहीं मानिलें हत्येतें। तन्मयत्वें संग्राम॥३१॥ असो यापरी हनुमंत। निजात्मध्यासें युद्ध करित। रणीं खवळला अत्यद्भुत। पुच्छकेत सोडिला॥३२॥ आला आला रे पुच्छकेत। नगरीं मांडिला आकांत। राक्षस शंखस्फुरण[8] करित। सैरा धांवत दशदिशा॥३३॥ पुच्छ येतां बाजारांत। चाटे[9] दिंडांमाजी लपत। वाणी लपती पोत्यांत। पुच्छ ओढित तेथूनी॥३४॥ तेली लपती घाण्यांत। साळी दडती निजगर्तेत। पानपसारे अटक्यांत। पुच्छ काढित तेथूनी॥ विचारोनि युक्ति शूद्रीं। लपती कडब्यामाझारी। पुच्छ अवचितें पायीं धरी। काढी बाहेर ओढोनी॥३६॥ एक तळघरीं देती दडिया। एक समुद्रीं देती बुडिया। एक टाकिती पेवीं उडिया। पुच्छ पायां सोडीना॥३७॥ कोट्यनुकोटी राक्षसभार। मारिले हनुमंतें समग्र। नगरीं उठिला हाहाकार। रजनीचर[10] पळताती॥३८॥ धांवत आले राजगृहासी। जानविलें चंद्रसेनेसी। येरी जाणोनि मानसीं। निजयुक्तीसी सांगत॥३९॥ पुच्छ जवळी येतां जाण। घाला जानकीची आण। तेचि युक्तीतें करोनी। कित्येक जाण वांचले॥२४०॥

**हनुमंताचे रामचंद्रासन्निध आगमन व कथन:** ऐसें करोनि चरित्र। उड्डाण करी वायुपुत्र। जेथें

शब्दार्थ : १. लोखंडी पहार, २. भय, ३. नाश, ४. सर्वत्र पहाणारा, ५. घटामध्यें, मडक्यांत, ६. लोकव्यवहाराला मान्य, ७. स्त्रिया, ८. शंखध्वनी, ९. कापडवाले, १०. राक्षस.

उभे श्रीराम सौमित्र। मित्र तिकडे सत्वर परतला ॥४१॥ अगाध हनुमंताची ख्याती। स्वर्गी सुरवर वानिती। लिहितां न पुरे एवढी क्षिती[1]। यथामती बोलतां ॥४२॥ येरीकडे श्रीरघुनंदन। अनुलक्षूनि लक्ष्मण। म्हणे युद्धाचें लक्षण। कैसें जाण भासलें ॥४३॥ वैरी कोठून उद्भवले। कैसेनि नाशातें पावले। हें तंव महाआश्चर्य झालें। कोणें केलें कळेना ॥४४॥ ऐकोनि बोले सुमित्रासुत। वाढ वेळ गेला हनुमंत। त्यावीण हा कार्यार्थ। नव्हे निश्चित दुजियाचा ॥४५॥ ऐसें दोघे संवादती। तंव आकाशपंथें मारुती। उतरोनियां शीघ्रगतीं। श्रीरघुपति नमियेला ॥४६॥ देवाभक्तां होतां भेटी। निजानंदें कोंदली सृष्टी। गगनीं केली पुष्पवृष्टी। सुखसंतुष्टीं सुरवरीं ॥४७॥ हनुमंतासी श्रीरघुनंदन। म्हणे आम्हांतें सांडोन। कोठें केलें होतें गमन। मजलागून सांगावें ॥४८॥ ऐसें बोलतां श्रीरघुपती। वरतें न पाहे मारुती। म्लानवदन दीनवृत्ती। श्रीरामाप्रती अनुवादे ॥४९॥ दुर्धर देखोनि अहिरावणा। जावोनि प्रार्थिली चंद्रसेना। तुझ्या देवोनि अंतुरीपणा[2]। जय आंदणा घेतला ॥२५०॥ तुझें एकपत्नीव्रत। हें तों घडेना निश्चित। अतएव माझा संचितार्थ[3]। पैं विपरीत फळिन्नला ॥५१॥ तुझें नाम स्मरतां वदनीं। पापी वसती वैकुंठभुवनीं। माझे पूर्वज नरकायतनीं[4]। तुझे कारणीं पडियेले ॥५२॥

श्रीरामांची प्रतिक्रिया : ऐसें बोलतां हनुमंत। कृपेनें कळवळला रघुनाथ। तूं तंव माझा परम आप्त। भला कार्यार्थ साधिला ॥५३॥ जैसें निवारिलें संकट। तैसें निवारीं हे दुर्घट। आम्हांसीं अणुमात्र खटपट। नलगे स्पष्ट तव धर्मे ॥५४॥

हनुमंताची चंद्रसेनेला तयारीची सूचना : ऐसें बोलतां श्रीरघुवीर। वेगें उडाला वायुकुमर। चंद्रसेनेचें मंदिर। अति सत्वर ठाकिलें ॥५५॥ तियेसी बोले हनुमंत। तुझे पुरवावया मनोरथ। येथें आणितों श्रीरघुनाथ। सावचित्त तूं ऐस ॥५६॥ श्रीराम सर्वात्मा सर्वज्ञ। श्रीराम त्रैलोक्यातें मान्य। त्याचें आतिथ्य करितां सामान्य। सत्य जाण महादोष ॥५७॥ ब्रह्मादिका पडे दृष्टी। तो येतसे तुझे भेटी। भाग्य तुझें न वदवे होटीं। धन्य सृष्टीं तूं एक ॥५८॥ तरी ऐकें एक वचनार्थ। शेज करावी सुनिश्चित। अणुमात्र भंगल्या श्रीरघुनाथ। उठोनि त्वरित जाईल ॥५९॥

हनुमंताची भ्रमराला मंचक कोरण्याची आज्ञा : येरी बरें म्हणोनि पाहीं। शेज सांवरी लवलाहीं। हनुमंतानें तेचि समयीं। भ्रमर हृदयीं आठविला ॥२६०॥ तो स्मरतांचि पातला तेथें। नमस्कारिलें हनुमंतातें। काय आज्ञा करीं मातें। निजभावार्थे पूसत ॥६१॥ ऐकोनि बोलिजे हनुमंतें। चंद्रसेनेच्या मंदिरातें। तुवां जावोनि गुप्तपंथे। मंचकातें कोरावें ॥६२॥ पोंचट करावा मंचक। वरी बैसतां रघुकुळटिळक। भंगोनि जाय एकाएक। ऐसा देख करावा ॥६३॥ आज्ञा म्हणोनि मधुकर[5]। वेगें पावला राजमंदिर। मंचक कोरूनि समग्र। किंचिन्मात्र रक्षिला ॥६४॥ कर्दळीपत्रप्रमाण। त्वचा रक्षोनियां जाण। वेगें करोनि उड्डाण। पवननंदन[6] वंदिला ॥६५॥ तुवां दिधलें जीवदान। त्याचें न होववे उत्तीर्ण। परंतु स्वल्प सेवा जाण। तुजलागून अर्पिली ॥६६॥ हनुमान येवोनि श्रीरामापासीं। भ्रमर भेटविला श्रीरामासी। श्रीरामें देवोनि आलिंगनासी। मधुकरासी गौरविलें ॥६७॥ भ्रमर म्हणे पवनात्मजा। तुवां उद्धार केला माझा। मज भेटविला श्रीरामराजा। झालों तुझा उपकारी ॥६८॥ ऐसें स्तवोनि उभयतांसी। भ्रमर गेला निजधामासी। हनुमंतानें श्रीरामासी। राजगृहासीं चालविलें ॥६९॥

श्रीरामांचे चंद्रसेनेच्या निजमंदिरात आगमन व मंचकभंग : श्रीराम येतां निजमंदिरा। आडवी धांवोनि सुंदरा। नमस्कारोनि श्रीरघुवीरा। निजवोंवरा[7] आणिलें ॥२७०॥ श्रीराम बैसतां मंचकावरी। झाली मंचका चकचूरी। तैंच उठोनि झडकरी। निघे बाहेरी श्रीराम ॥७१॥

शब्दार्थ : १. पृथ्वी, २. पत्नीत्व, ३. प्रारब्धकर्म, ४. नरकांत, ५. भ्रमर, ६. मारुती, ७. स्वमंदिरात.

चंद्रसेनेचा हनुमंतावर क्रोध : कपट कळलें चंद्रसेनेसी। मग भरोनि क्रोधावेशीं। काय बोलिली हनुमंतासी। कपटी होसी तूं एक॥७२॥ अरे कपटिया श्रीरामदूता। आपुलें कार्य साधिलें धूर्ता। मारवोनि माझ्या कांता। हितस्वार्था नागविलें॥७३॥ अति भावार्थे पुसोनि वर्म। शेखीं केलें घातक कर्म। कोठें राहिला सत्य धर्म। महा अधर्म त्वां केला॥७४॥

श्रीरामांकडून सांत्वन व उपदेश : आतां शाप घेई माझा। म्हणोनि बोलली राक्षसभाजा[1]। कृपा आली राघवराजा। पवनात्मजाकारणें॥७५॥ माझ्या कार्यालागीं जाण। येणें केलें हें विंदान[2]। आणि शाप दारुण। किमर्थ आपण घालावा॥७६॥ ऐसें विचारूनि पोटीं। आत्मज्ञानाचे परिपाठीं। चंद्रसेनेसी सांगे गोष्टी। कृपादृष्टीं कृपाळू॥७७॥ मी सर्वात्मा सर्वदेशीं। व्यापक नव्हे एकदेशी। व्यापकता नाना आकारांसी। निजदेहासीं व्यापक॥७८॥ श्रीरामें धरली धरा राहे। श्रीरामें जीवन जीवताहे। श्रीरामप्रतापें वायु आहे। चाळविताहे सर्वांसी॥७९॥ श्रीरामें दिधला अवकाश। म्हणोनि नांदताहे आकाश। श्रीरामें तेजासी प्रकाश। श्रीराम सर्वांसीं व्यापक॥२८०॥ श्रीराम बुद्धीसी बोधविता। श्रीराम चित्तासी चेतविता। अंत:करणीं सर्व सत्ता। श्रीरघुनाथाचेनि धर्मे॥८१॥ श्रीरामें सबळ अहंकार। श्रीरामें मनाचा व्यापार। श्रीराम प्राणांसीं परिचार[3]। श्रीराम साचार सर्वगत॥८२॥ श्रीरामें नयनांसी द्रष्टेपण। श्रीरामें श्रवणांसी होय श्रवण। श्रीरामें सुवास घेणें घ्राण। श्रीरामेंविण तें व्यर्थ॥८३॥ श्रीरामें गोडी जाणे रसना। श्रीरामें बोले वदन वचना। श्रीरामें प्राणी मीतूंपणा। जाणे जाणा तत्वतां॥८४॥ श्रीराम शरीर उठवी बैसवी। श्रीराम शरीर निजवी फिरवी। हें जाणते स्वानुभवी। येरां पदवी अतर्क्य॥८५॥ श्रीराम प्राणांचाही प्राण। श्रीराम जीवाचें जीवन। श्रीराम मनाचें उन्मन[4]। चैतन्यघन श्रीराम॥८६॥ ऐसा श्रीराम तो सर्वगत। भोगीत राहें तूं निवांत। सद्गुरूमुखें करोनि प्राप्त। आन किमर्थ वांछिसी॥८७॥ म्हणसी सद्गुरूसी पुसों जातां। हातींचा जासील तूं आतां। तरी एतद्विषयीं ऐक कथा। तुज सर्वथा सांगेन॥८८॥ सकळ सृष्टीचा मी कर्ता। ईक्षणमात्रें सृष्टीचा हर्ता। सर्वांमाजी आत्मसत्ता। तों मी तत्वतां उपदेशीं॥८९॥ ब्रह्मा माझा नित्यांकित। शंकर माझे ध्यान करित। विष्णु तो मी मूर्तिमंत। उपदेशित तुजलागीं॥२९०॥ म्यां बोलविल्या वेद बोले। म्यां चालविल्या सूर्य चाले। म्या हालविल्या देह हाले। तो मी बोलें तूजसीं॥९१॥ ईश्वराचा मी ईश्वरु। गुरुचाही आदिगुरु। मजहूनि परता सद्गुरु। कोण सधरु[5] असेल॥९२॥ यथा देव तथा गुरु। या श्रुतिवाक्याचा निर्धारु। तो मी स्वमुखें सद्गुरु। करीं सधरु उपदेश॥९३॥ तुझ्या देहांचा चाळक। तो मी आत्माराम देख। त्यासीं भोगितां हें चोख। आवश्यक अंतरीं॥९४॥ तया भोगाचें लक्षण। तेंही ऐक सावधान। सर्वसाक्षी चैतन्यघन। तो मी पूर्ण हा ध्यास॥९५॥ तया ध्यासाच्या परिपाठीं। दृश्य द्रष्टा दर्शन त्रिपुटी। समूळ मावळली हे गोष्टी। पाठीपोटीं श्रीराम॥९६॥ द्वैताचा ठाव नाहीं जेथें। भोग्य भोक्ता कैंचा तेथें। मज भोगिजे श्रीरघुनाथें। हें कोणातें नाठवे॥९७॥ असो ऐसिया निजात्मध्यासें। सांडी दुजेपणाचें पिसें। हेंचि भोगीं निजमानसें। तुज म्या जैसें सांगितलें॥९८॥ तथापि आवडीच्या भरें। श्रीराम भोगावा शरीरें। म्हणसी तरी या अवतारें। हें निर्धारें घडेना॥९९॥

पुढील अवतारी चंद्रसेनेला कामनापूर्तीचे रामाचे आश्वासन : तथापि भक्तभावासाठीं। मज अवतरणें शुष्ककाष्ठीं। तुझिये प्रीतीस्तव गोरटी। करीन गोष्टी ते ऐक॥३००॥ यादवकुळीं द्वापारांत। कृष्णरूपें श्रीरघुनाथ। तुजला वरील निश्चितार्थ। वचन सत्य हें जाण॥१॥ तेथें

शब्दार्थ : १. राक्षसपत्नी, २. युक्ती, ३. संचार, ४. माया व अविद्या यांनीं रहित मनाची स्थिती, ५. श्रेष्ठ.

राजा सत्राजित। त्याचे उदरीं तूं जनित। सत्यभामा होसी सत्य। तुज मी तेथ वरीन॥२॥ अतिशयेंसीं भावार्थ। असे तुजपासीं नांदत। तुझा होईन मी अंकित। माझे भक्त मज प्रिय॥३॥ भक्त जैसा मज नाचवित। तैसा तैसा मी नाचत। आतां राहें तूं निवांत। मज भोगित अंतरीं॥४॥ मातें गावें मजला ध्यावें। मातें पहावें मज स्मरावें। मद्रूप होवोनियां रहावें। ऐसेनि हरावें काळातें॥५॥ ऐसें बोलतां श्रीरघुनंदना। तन्मय झाली चंद्रसेना। विसरली मीतूंपणा। श्रीरामवचना अनुसरली॥६॥ बरवें म्हणोनि श्रीरामासी। नमस्कारिलें साष्टांगेंसीं। म्हणे उद्धरिलें दीनासी। धन्य होसी श्रीरामा॥७॥ माझा सद्गुरु वायुकुमर। तेणें भेटविला श्रीरघुवीर। त्याचा न वर्णवे उपकार। दासी किंकर मी त्याची॥८॥ परम कृपाळु दशानन। वैकुंठासी करितां गमन। आमुचें त्यासी झालें स्मरण। श्रीरघुनंदन पाठविला॥९॥ आपण गेलिया मोक्षासी। कोण उद्धरील त्यांसी। श्रीराम न येचि पाताळासी। म्हणोनि यासी धाडिलें॥३१०॥ येथें धाडोनि श्रीरघुनंदन। सकुळ तारिला अहिरावण। धन्य धन्य दशानन। वाटे पूर्ण कृपाळु॥११॥ धन्य धन्य तो राक्षसराज। धन्य धन्य तो पवनात्मज[१]। धन्य श्रीराम विजयध्वज। जेणें मज उद्धरिलें॥१२॥ ऐसें करोनियां स्तवन। केलें श्रीरामासी नमन। घालोनियां पद्मासन। बैसली जाण ध्यानस्थ॥१३॥

**मकरध्वजाला महिकावतीचे राज्यपद :** यानंतर श्रीरघुनाथ। मकरध्वज जो हनुमंतसुत। महिकावतिये[२] अभिषेकित। राजा करित तयासी॥१४॥ आशीर्वाद वदे श्रीरघुनंदन। जोंवरी लंकेसीं विभीषण। तोंवरी राजसिंहासन। तुजलागोन पाताळीं॥१५॥

**रामलक्ष्मणाचे हनुमंतासह वानरसैन्यांत पुनरागमन:** ऐसें देवोनि आशीर्वचन। श्रीराम हनुमंत लक्ष्मण। वेगें निघाले तेथून। लंकाभुवन पावावया॥१६॥ मग हनुमंतें दोघे जण। स्कंधीं बैसविले आपण। वेगें करोनि उड्डाण। आला जाण बिलद्वारा॥१७॥ विवरीं अवघा अंधकार। श्रीराम स्वयें प्रकाशकर। दर्शनें केला विवरोद्धार। पंथ दुर्धर क्रमियेला॥१८॥ आले एकाएकीं बाहेरी। वानरसैन्यामाझारीं। अग्निशशांकसूर्यापरी। वानरवीरीं देखिले॥१९॥ तीन अहोरात्रें श्रीराम। कोठें होता पूर्णकाम। आतां आला विश्रामधाम। आल्हाद पूर्ण वानरां॥३२०॥ कोणी नमिती श्रीरामासी। कोणी भेटती लक्ष्मणासी। कोणी वंदिती हनुमंतासी। हरिनामेंसीं गर्जती॥२१॥ आला आला दीनदयाळ। आला आला भक्तवत्सल। आला आला प्रणतपाळ। पूर्ण कृपाळ श्रीराम॥२२॥ आला आला सत्यप्रतिज्ञ। आला आला हो सर्वज्ञ। आला आला रघुनंदन। दीनोद्धारण श्रीराम॥२३॥ आला आला भक्तकैवारी। आला आला अहल्योद्धारी। आला आला पौलस्त्यारी[३]। वानरभारीं आल्हाद॥२४॥ आला आला भक्तांतरंग[४]। आला आला सीतारंग। आला आला विश्वतरंग[५]। अंतरंग जो आत्मा॥२५॥ ऐसिया प्रेमाचिया पडिभारें[६]। गर्जों लागलीं वानरें। देखोनि श्रीरघुवीरें। अत्यादरें आलिंगिलीं॥२६॥ मग सुग्रीव बिभीषण। करीं धरोनि श्रीरघुनंदन। शिबिरामाजी नेले जाण। सुखसंपन्न बैसले॥२७॥ पुढील कथेचें अनुसंधान। रावणहोमविध्वंसन। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य॥२८॥ श्रोते म्हणती नवलकथा। श्रीरामकाव्यामाजी नसतां। कोठोनि काढिली ही कथा। ऐकोनि वक्ता बोलत॥२९॥ शतकोटी श्रीरामचरित्र। वदलें वाल्मीकाचें वक्त्र। कोठें कैसें चित्रविचित्र। कोणें समग्र शोधिलें॥३३०॥ परी प्रस्तुत अग्निपुराण। श्रोतीं पहावें शोधून। सेतुबंधनमाहात्म्यीं जाण। हें आख्यान सविस्तर॥३१॥

---

शब्दार्थ : १. मारुती, २. महिकावती नगरीत, ३. रावणशत्रु राम, ४. भक्तांच्या हृदयात राहणारा, ५. विश्व हे तरंगाप्रमाणे ज्यांच्या ठिकाणी आहे असा, ६. अधिकपणाने.

आळस सांडोनियां चित्तें । क्षणभरी करोनि अवकाशातें। पहावें शोधून ग्रंथातें। आशंकेतें फेडावें ।।३२।। एकनाथी रामायण। केले सप्तकांडकथन। त्यांत अहिरावणाख्यान। काय म्हणोन विसरलें।।३३।। ऐसें न वदावें उत्तर। ते तंव विष्णुचा अवतार। त्यांसी स्वप्नीं नाहीं विसर। महाचतुर ग्रंथकर्ते।।३४।। परंतु झाले बहुत दिवस। मुखीं पाळितां ग्रंथास। गाहाळिलें ह्या अध्यायास। तिहीं तयास काय कीजे।।३५।। मग साक्षेपें जयरामसुतें। करोनि घातलें अध्यायातें। हृदयीं रिघोनि एकनाथें। हें मजहातें करविलें।।३६।। माझें नव्हे हें ज्ञान। कांही नेणें मी व्याख्यान। माझे हृदयीं प्रवेशून। केले कथन श्रीरामें।।३७।। श्रीराम नयनांचाही नयन। श्रीराम श्रवणांचाही श्रवण। श्रीराम मनाचें आदिमन। तेणें लेखन हें केलें।।३८।। श्रीराम सर्वां बुद्धिदाता। सर्वी सर्वत्र त्याची सत्ता। हेंही करणें श्रीरघुनाथा। काय आतां मी सांगू।।३९।। ऐसें श्रोत्यांसी प्रार्थून। जयरामात्मजें करोनि नमन। म्हणे पुढील अनुसंधान । सावधान परिसावें।।३४०।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां अहिरावणवधश्रीरामगमनं नाम चतुःपंचाशत्तमोऽध्यायः ।।५४।। ओंव्या।।३४०।।

## अध्याय पंचावन्नावा

।। श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### सीता - मंदोदरी संवाद

श्रीराम नाहीसे झाल्याबद्दल वानरांचा प्रश्न : आनंद झाला सर्वांसी। श्रीराम आला निजमेळिकारांसी। लागले श्रीरामचरणांसी। रामें हृदयेंसीं आलिंगिले।।१।। परियेसीं स्वामी श्रीरामा। दीन अनाथां प्लवंगमां। सांडोनि गेलासि आम्हां। सर्वोत्तमा काय केलें।।२।। तुझ्या पोटीं होतें जाणें। एकासी तरी होतें सांगणे। न पुसतां घडलें जाणें। उचित करणें हें नव्हे ।।३।।

मारुतीकडून राममहतीचे कथन : तंव बोलिला हनुमंत। तुम्हां वानरां न कळे मात। पूर्णावतार रघुनाथ। त्यासीं सांगात काय करी।।४।। जो दुजियाची वाट पाहे। त्याचें कार्य कधीं न होये। यश कोठेंचि न लाहे। श्रीराम पाहा तैसा नव्हे।।५।। श्रीराम एकला एकांगवीर[१]। न धरी दुजियाचा आधार। तो वानरांसी विचार। पुसे साचार हें न घडे ।।६।। जाणें होतें पाताळासी। कळों न देतां कोणासी। जावोनियां अति वेगेंसी। अहिरावणासी मारिलें।।७।। अहिरावण महिरावण। सखे बंधु दोघे जण। त्यांसी वधावया जाण। श्रीराम आपण स्वयें गेला।।८।। मारिलिया रावणासी। अवकाश न पुरे जावयासी। वेढा काढवोनि वेगेंसीं। पाताळासी स्वयें गेला।।९।। जरी जावें पुसोनी। तरी निवारूं आम्ही कोणी। गेला न पुसतां म्हणोनी। प्रकट जनीं न करीच।।१०।।

श्रीरामांचे वृत्तांत कथन: ऐकोनि तो विचार। हरिखेला वानरभार। श्रीराम एकांगवीर। युद्ध थोर पैं केलें।।११।। दुसरा कैंचा हनुमंत। म्हणोनी पुसे वानरनाथ। ऐकोनि तयाची मात। श्रीरघुनाथ स्वयें सांगे।।१२।। वानरभार जैं निजेला। अहिरावणें घालोनि घाला। दोघां जणां धरोनि वहिला। गेला पाताळा घेउनी।।१३।। मार्ग काढोनि त्वरित। आला पाताळा हनुमंत। मकरध्वज द्वार राखित। नगराआंत रिघों नेदी।।१४।। युद्ध झालें दोघांसीं। न लोटती येरयेरांसी। हनुमान क्षोभोनि पुसे त्यासी। झाली दोघांसी ओळखी।।१५।। हनुमंताचा स्वेदज[२] पुत्र। पुसतां निघाला वीर मकर। भेटोनियां पितापुत्र। मज सत्वर सोडविलें।।१६।। मारोनियां राक्षसांसी। मुक्त करोनि पाताळासी। राज्य देतां मकरध्वजासी। भेटों तुम्हांसी येथें

शब्दार्थ : १. बहुत वीरांशी एकटा युद्ध करणारा, २. घामापासून झालेला.

आलों ॥१७॥ हनुमंताचा आत्मज[1]। अतिविख्यात मकरध्वज। ऐकोनि कपिसमाज। पुच्छध्वज उभारिले॥१८॥ मग क्षेम[2] देती येरांयेर। येरयेरां करिती नमस्कार। होवोनियां आल्हादपर। श्रीरघुवीर नमियेला॥१९॥ झालें सकळां समाधान। हरिखें नाचती वानरगण। तंव रावणाचे दूत जाण। हेरपण करिती रामकटकीं॥२०॥

रावणाच्या हेरांनी रावणाला बातमी सांगितल्याने रावणाने चिंताग्रस्त विचाराने मंदोदरीला सीतेकडे पाठविले : वृत्तांत ऐकोनि समग्र। गेले रावणासमोर। सांगितलें सविस्तर। रामचरित्र यथाश्रुत॥२१॥ अहिरावण महिरावण। यांचा वध ऐकोनि जाण। दहा मुखीं रावण। शंख आपण करितसे॥२२॥ मनोरथ न वचती सिद्धी। झाली सकळांची अवधी[3]। आतां काय करूं बुद्धी। लागली आधी[4] रावणा॥२३॥ दुर्धर कष्ट करोनि जाण। आणिलें सीता चिद्रत्न। तेंही नव्हे भोगायतन। कोण प्रयत्न करूं आतां॥२४॥ प्रार्थोनियां मंदोदरीसी। वश्य करीन जनकदुहितेसी। भोगितां मैथिलीसी। केल्या कष्टासी परिहार॥२५॥ धरावया मृगगणा। घरीं पाळिती भांड हरणा। स्वयातीसीं विश्वासोन जाणा। निजबंधन पावती॥२६॥ कामी पुरुष सकामासी। जार स्त्री पुंश्चलिसी[5]। किंवा तस्कर तस्करासी। वश्य करी हेरासी पैं हेर॥२७॥ हरिभक्त हरिभक्तासी। दृष्टी पडतां येरयेरांसी। मिठी पडे अतिप्रीतीसीं। सेव्य दोघांसी परमात्मा॥२८॥ योगी आकळे योगबळें॥ ज्ञानिया निजज्ञानमेळें। निःसंगत्वें वैराग्यशीळें। सद्य[6] आकळे परब्रह्म॥२९॥ तेंवी पतिव्रता पतिव्रतेसी। वश्य करी क्षणमात्रेंसीं। म्हणोनियां मंदोदरीसी। सीताप्राप्तीसी पैं प्रार्थी॥३०॥ ऐसें विचारोनि रावण। निजकार्या सावधान। अत्यंत प्रीति करून। निजकांता जाण पाचारी॥३१॥ अत्यंत नम्र अति प्रीतीसीं। बोलता झाला मंदोदरीसी। तूं सती पतिव्रता होसी। माझ्या वचनासी नुपेक्षीं॥३२॥ पतिव्रतेचा धर्म पूर्ण। नुल्लंघावें पतिवचन। ऐसें आहे वेदवचन। शास्त्रपुराणसंमत॥३३॥ म्हणोनियां तुजप्रती। करीतसें मी विनंती। अनुसरोनि वचनस्थिती। कार्य निगुतीं साधावें॥३४॥ जानकीभोगाची आस्था। अत्यंत लागलीसे चित्ता। ते कामना सिद्धी न वचतां। प्राणांतव्यथा होतसे॥३५॥ मांडलें अत्यंत निर्वाण। निमाले पुत्रादि प्रधान। सैन्य निमालें संपूर्ण। वीर दारुण रणयोद्धे॥३६॥ अदट वीर कुंभकर्ण। तोही मारिला विटंबून। गोष्टी सांगावया पुरती जाण। सांगातें आननुरेचि॥३७॥ ऐसें सकळ कुळाचें निर्दळण। झालें असतां संपूर्ण। माझें हृदयींचे शल्य जाण। अर्ध क्षण न ढळेचि॥३८॥ जेवितां रुचेना अन्न। चवी नेदी पैं जीवन[7]। झोंप नये केल्या शयन। अवस्था[8] पूर्ण लागली॥३९॥ सपुत्र सैन्य निमालें देख। त्याचें अणुमात्र नाहीं दुःख। परी भोगावया सीतासुख। आस्था अलोलिक लागली॥४०॥ त्या आस्थेचें निरसन। मंदोदरी तुझेनि जाण। मज होईल समाधान। म्हणोनि विनवण करीतसें॥४१॥ तूं सती पतिव्रता। नुल्लंघिसी पतिवचनार्था। सांडोनियां निजमहत्त्वा। शरण तत्वतां तुज आलों॥४२॥ कार्य साध[illegible] संपूर्ण। म्हणोनि धरिले दोनी चरण। सांडोनियां राजचिन्ह। तुज विनवण करीतसें॥४३॥ कामासीं आतुडला संपूर्ण। तो न पाहे मानापमान। स्त्रियेचे धरितां चरण। लज्जा रावण मानीना॥४४॥ येरी निवारोनि वेगेंसीं। स्वयें लागली चरणांसी। भाग्य आलें जी फळासी। निजकार्यासी आज्ञापिलें॥४५॥ जितुकें माझें युक्तिबळ। तितुकें वेंचोनि सकळ। प्रबोधीन[9] जनकबाळ। परी प्राप्तिकाळ दैवाधीन॥४६॥

दैवाधीन विचाराने मंदोदरी सीतेला भेटावयास जाते: ऐसी रावणासी एकांतीं। संवादोनि महासती। आली निजधामाप्रती। होतें चित्तीं तें झालें॥४७॥ बाप कृपाळु भगवंत।

---

शब्दार्थ : १. मुलगा, २. आलिंगन, ३. समाप्ती, नाश ४. मनोव्यथा, ५. जारिणीला, ६. तत्काल, ७. उदक, ८. काळजी, ९. उपदेशीन.

निजभक्तांचें मनोगत। पुरवावया सावचित्त। अनाथनाथ श्रीराम॥४८॥ होतें मंदोदरीच्या चित्तीं। जे भेटावी सीता सती। राम भोगी कोण्या स्थितीं। हें सीतेप्रती पुसावें॥४९॥ श्रीराम कैसा किमात्मक। श्रीराम भोगी कैसें सुख। सविकल्प निर्विकल्प। हेंही सकळिक पुसावें॥५०॥ श्रीरामाचें ठाणमाण। रूपरेखा गुणलक्षण। सर्वगत कीं परिच्छिन्न[1]। स्थिति संपूर्ण रामाची॥५१॥ श्रीराम केवढा कैसा असे। कोठें असे कोठें वसे। पुसावया जीवीं उल्लासें। जानकीस अहर्निशीं॥५२॥ ऐसी मंदोदरीच्या चित्ता। होती अनिवार अवस्थां[2]। कैं भेटेल जनकदुहिता। निजगुह्यार्था पुसेन॥५३॥ अवचटें सीता सती। हातींची गेलिया निश्चितीं। कोणा पुसावी निजगुह्यस्थिती। चिंता चित्तीं अनिवार॥५४॥ भाग्यें भेटल्या साधूसी। अवश्य पुसावें निजगुह्यासी। जाणोनि जो होय उदासी। पाप त्यापासीं खतलें[3]॥५५॥ बहुकळ ज्यासीं खता चढे। साहणे तोडितां तो न झडे। लोहाऐसें कठिण गाढें। करी रोकडें मृत्तिका॥५६॥ अभिमानाची जाति पाहीं। साधुसंतां न मानी कांहीं। ज्ञानगर्वें बुडाले तेही। शुद्धि नाहीं तयाची॥५७॥ मनुष्यदेहाची निजप्राप्ती। शिणतां न पवे लक्षांतीं। येथेंही विकल्प चित्तीं। तोंडी माती पडली ती॥५८॥ एक नरदेह नेणोनि गेले। एकीं लटकें म्हणोनि उपेक्षिलें। एक ते साधनीं ठकले[4]। आपमती सैरा भरले। एक करूं करूं म्हणतां गेले। करणे राहिलें तैसेंचि॥६०॥ पोटीं अनिवार विषयस्थिती। ज्ञान मिरविती लोकांप्रती। जीविका त्यावरी करिती। घात निश्चितीं। स्वयेंचि केला॥६१॥ जेणें व्हावी निजप्राप्ती। तें वेचलें विषयासक्ती। स्वयेंचि नागवले निश्चितीं। भांडवल हातीं असेना॥६२॥ स्वप्नीं जोडिली जे संपत्ती। ते वेंचितां नये जागृतीं। विषयी आणि ब्रह्मनिष्ठ म्हणविती। भ्रम निश्चितीं या नांव॥६३॥ जरी धांवणें नागवी आपण। तरी कोण करील सोडवण। अभिमानें यापरी जाण। सकळ जन नागविले॥६४॥ जे ज्ञानगर्वें नागविले। ते काळातें न देखती वहिले। सिद्ध आयुष्य वांयां गेलें। जें जोडितां न मिळे पुण्यकोटी॥६५॥ झालिया नरदेहप्राप्ती। परमार्थ साधावा हातोहाती। जेंवी कृषीवलाची[5] स्थिती। मढें झांकिती पेरणीसीं॥६६॥ आजि हें राहो करीन पाहें। म्हणतां काळ कृपाळु नोहे। क्षणक्षणां जात आहे। उत्तम आयुष्य घेवोनियां॥६७॥ ऐसी काळाची काळसत्ता। जाणोनि मंदोदरीच्या चित्ता। लागली अनिवार अवस्था। जनकदुहिता भेटावया॥६८॥

मंदोदरीचे अशोकवनामध्ये आगमन : तव आज्ञापिलें रावणें। उल्लासोनियां चौगुणें। करूं आदरिलें येणें। रामांगनेसी भेटावया॥६९॥ अशोकवना येवोनी। पाहे मंदोदरी नयनीं। तंव देखिली जनकनंदिनी। रामानुसंधानीं आसनस्थ॥७०॥ श्रवणीं राम नयनीं राम। वाचेसीं नित्य वदवी राम। ध्यानीं राम मनीं राम। अनुसंधानीं राम अखंड॥७१॥ प्राणाचा निजसंचारी। राम न विसंबेचि सुंदरी। सकळ इंद्रियविकारीं। झाली अविकारी श्रीरामें॥७२॥ चोर धरियेला राजद्वारीं। त्यासीं निग्रहिती[6] नानापरी। तेंवी इंद्रियवृत्ती समग्री। सीता सुंदरीं निग्रहिल्या॥७३॥ ऐसी दृष्टीं देखतां जानकीसी। अति उल्लास मंदोदरीसीं। विसरोनि गेली देहभावासी। मिनली प्रीतीसीं अहंत्यागें[7]॥७४॥ साधु देखतांचि दृष्टीं। जरी विरे[8] अहंकाराची गांठी। पडे स्वानंदाची मिठी। उडे त्रिपुटी अभावें॥७५॥ सांडोनियां मीतूंपण। सीतेसी बोलावया जाण। साधूं आदरिलें विंदाण। ऐसी अति विचक्षण मंदोदरी॥७६॥ अति चातुर्याचा प्रश्न। पुसती झाली विचक्षण। रावणाचें कार्य जाण। साधून विंदान स्वरूप पुसे॥७७॥ शब्दें व्यापिलें गगन। निमालें शून्याचें शून्यपण। तेथें परादि वाचा पुसे कोण।

शब्दार्थ : १. मर्यादित, २. उत्कंठा, ३. चिकटून राहिले, ४. स्वच्छंदे, ५. शेतकऱ्याची, ६. अटकेत ठेवतात, ७. देहाभिमान टाकून, ८. नाहीशी होते.

अर्थ संपूर्ण आकर्षी॥७८॥ अहाच दृष्टी पाहतां। येथींचा अर्थ न ये हाता। चित्त विनटलें तत्वतां। तें शब्दार्था पाविजे॥७९॥ यालागीं श्रोते सज्जन। निजहितीं कुशल पूर्ण। करोनि सर्वांगाचें अवधान। शब्दार्थ जाणा परिसावा॥८०॥ जीवामाजी घालोनि जीव। परिसतां हें अर्थगौरव। तैं सिद्धि पावे कार्य सर्व। भवभय निवारे॥८१॥ असो आतां जानकीसी। मंदोदरी अति प्रीतीसीं। पुसती झाली वेगेंसी। राम अनुभविसी तो कैसा॥८२॥ राम व्यापक कीं एकदेशी। हें सांगावें मजपासीं। सकळ देहीं श्रीरामासीं। स्थिति कैसी वस्तीची॥८३॥ जरी म्हणसी परिच्छिन्न[1]। तरी व्यापकत्वा पडिलें खान। आत्माराम हें अभिधान[2]। न घडे जाण तयासीं॥८४॥ जरी त्यातें व्यापक म्हणसी। तरी तो सर्वभूतनिवासी। मग तेथें उपेक्षितां रावणासी। अद्वैतभजनासीं अभावो॥८५॥ ब्रह्मा[3] धरोनि[3] मुंगीवरी[3]। राम व्यापक चराचरीं। तो रावणचेही शरीरीं। इंद्रियव्यापारीं नांदत॥८६॥ जरी रामानुसंधान रावणीं। भजतां होय कोण हानी। हें सांगावें साजणी। प्रीती करोनि मजलागीं॥८७॥

सीतेचे मंदोदरीला उत्तर : तंव हांसोनि सीता सुंदरी। उत्तर देती अतिकुसरीं[4]। तें परिसोनि मंदोदरी। विश्रांति थोरी पावली॥८८। सावध ऐकें साजणीं। प्रवेशतां रामानुसंधानीं। चित्त चित्तपणा विसरोनी। रामाहुन स्वयें राहे॥८९॥ द्रष्टा परिच्छिन्न होये। तैं दृश्य दृश्यत्वें भासों लाहे। श्रीराम स्वयें तैसा नव्हे। परिस माये सांगेन॥९०॥ श्रीरामाहून व्याप्य एक। असतां श्रीरामें व्हावें व्यापक । त्रिपुटीचा अभावो देख। व्याप्य व्यापक तेथें कैंचे॥९१॥ म्हणसी सर्वांच्या अंतरीं। राम असे चराचरीं। तो रावणाच्या शरीरीं। इंद्रियव्यापारीं वर्तत॥९२॥ राम सर्वांच्या हृदयीं आहे। धरितां त्या हृदयस्थाची सोये। राम रावण कोठें आहे। सांग पां माये यथार्थ॥९३॥ भोगितां निजहृदयस्थासी । अवकाश कैंचा भोक्तयासी। तेथें रावण कैंचा आणिसी। जे तयासी भोगावें॥९४॥ दृश्याचिये भेटी। द्रष्टा दृश्यपणें उठी। होतां तेणेंसीं तुटी। तोही शेवटीं असेना॥९५॥ आतां नाहींपणे असे। आणि असे तोचि दिसे। तरी रावणाचें काय पिसें। सांग सावकाशें साजणी॥९६॥ ऐकोनि सीतेच्या उत्तरीं। पूर्णावस्था मंदोदरी। चढला स्वेद कंप शरीरीं। आनंदलहरी दाटली॥९७॥ इंद्रियां विकळता झाली। चित्तचैतन्या मिठी पडली। अंतरीं सुखोर्मी[5] दाटली। तेणें पडली मूर्च्छित॥९८॥ बाप सद्गुरूचें सामर्थ्य। अलोलिक अत्यद्भुत। वचनमात्रें शक्तिपात। झाला निश्चित मंदोदरी॥९९॥ नाहीं हस्तक मस्तक। कृपें कळवळोनि देख। वचनमात्रें दिधलें सुख। झाल्या कल्पांत सरेना॥१००॥ छळणेंकरोनि बोलतां । तत्काळ झाली समाधिअवस्था। सद्भावें विनटतां[6] संतां। न कळे तत्वतां काय देती॥१॥ जाणोनियां श्रोते सकळ। ज्यांसी निजप्राप्तीची कळवळ। तिंहीं सांडोनियां छळ। सेवावे अविकळ[7] सज्जन॥२॥ परिस फोडावया जाण। सबळ बळें हाणिती घण। त्यासीं करितां सुवर्ण। न लगे क्षण तत्वतां॥३॥ तरी परीस बापुडें तें किती। लोहाचे ठायीं सुवर्णस्फूर्ती। परीस न करीच निश्चितीं। निजस्थिती वंचिली[8]॥४॥ तैसा नव्हेचि चंदन। अंगवात झगटतांचि पूर्ण। उद्यान[9] केलें आपणासमान। न्यून पूर्ण असेना ॥५॥ खैर धामोडे समग्र। वेहकळी टाकळी अत्युग्र। आदिकरोनि पांगार। झाले समग्र चंदन॥६॥ आणीक गुण अलोकिक। जो छेदावया आला देख। त्यासी परिमळ अधिक। जाळित्या देख तयाहोनी॥७॥ तेंवी सज्जनाचें लक्षण। छळें द्वेषभावें पूर्ण। जो आला तयापासीं जाण। त्यासी समाधान सारिखेंचि॥८॥ यापरी सीता सती। मंदोदरीची छळणवृत्ती। छेदोनियां छळणयुक्तीं। समाधि निश्चितीं पावविली॥९॥ बोलतां सीतेसीं बोलीं। आली वाट भुलविली। ऐसी जानकिया ख्याती केली। वचनें लाविली समाधी॥११०॥ कष्टें आली [10]बाह्यवृत्ती। तरी न मोडे

---

शब्दार्थ : १. मर्यादित, २. नाव, ३. ब्रह्मदेवापासून तो मुंगीपर्यंत, ४. फार चातुर्याने, ५. सुखाची लहरी = लाट, ६. अनुसरता, ७. अविश्रांत, ८. गुप्त ठेविली, ९. बाग, १०. देहस्मृतीवर.

सहजस्थिती। मंदोदरी चवके चित्तीं। कांही निजचित्तीं स्फुरेना॥११॥ मग कष्टीं म्हणे वो माये। देखिलिया तुझे पाये। जें सुख झालें आहे। तें बोली पाहें बोलवेना॥१२॥ परादि वाचा नव्हे सौरस[1]। येथें वोलासी कैंचा प्रवेश। ओसंडला अति उल्लास। राम परेश बोळला[2]॥१३॥ ऐसें बोलतां बाष्प कंठी। तंव मन मागुतें नुठी। इंद्रियां सुखसंतुष्टी। पडली मिठी चैतन्यीं॥१४॥ मग मौनेंचि लोटांगण। मंदोदरी स्वयें आपण। जानकीचे निजचरण। हृदयीं धरोन राहिली॥१५॥ तंव दुजी सन्नद्ध सहजासन। बैसली असतां सावधान। सहज निरसलें मन। रामरूपीं नयन निडारले[3]॥१६॥ तेथें पाहतां आत्मबिंब। उतटों पाहताहे नभ। मीतूंपणाची मिथ्या भांब[4]। दोघी स्वयंभ त्या झाल्या॥१७॥ एकाएकीं जनार्दनीं। दोघी दोनीपणा मुकोनी। मिळाल्या एक होउनी। अशोकवनीं शोकातीत॥१८॥

हेरांनी सीता – मंदोदरीच्या भेटीची बातमी रावणाला दिल्याने चिंता : तंव रावणें आपण। हेरपणें दासी जाण। मंदोदरीसवें देऊन। वृत्तांत संपूर्ण आणविला॥१९॥ दासीमुखें वृत्त समग्र। ऐकोनियां सविस्तर। तळमळिता झाला थोर । दशशिर रावण॥१२०॥ मंदोदरी आली तेथ। सांगितलें सकळ वृत्त। दशवदन चिंताक्रांत। कांही मत चालेना॥२१॥ अहिरावणादिचरित्र। सेतुमाहात्म्यीं समग्र। लिहिलें असे सविस्तर । नव्हे साचार[5] कल्पित॥२२॥ संदेह असेल ज्यांचे मनीं। तिहीं अवकाश करोनी। सेतुमाहात्म्य अवलोकूनी। संदेह खाणोनी सांडावा॥२३॥ असो आतां तो विचार। किती सुचवूं परिहार। वक्ता एक एकांगवीर। मी कोण किंकर परिहारा॥२४॥ ग्रंथाचें नामाभिधान। शुद्ध भावार्थरामायण। तो भाव जडला पूर्ण। असतां वक्तेपण मज कैंचे॥२५॥ भावीं अनुसरोनि रघुनाथ। वक्ता झाला एकनाथ। माझेनि हातें ग्रंथ लिहिवित। कर्ता करविता तो एक॥२६॥ तेथें कैंची परिहारता। म्हणोनि श्रोते साधुसंतां। शरण आलों जी तत्वतां। क्षमा आतां मज कीजे॥२७॥ पांवा मधुरध्वनी वाजे। वाजवित्याचेनि गाजे। जनार्दनें तैसें कीजे। ग्रंथ लिहिविजे मज करीं॥२८॥ म्हणोनि श्रोते जन। सर्वथा न ठेवावें दूषण। करितों हेचि विनवण। कृपावलोकनीं मज सनाथ कीजे॥२९॥ क्षमा करा ऐसें म्हणतां। तरी हों पाहे काव्यकर्ता। म्हणोनि मौनेंचि आतां। लोटांगण तत्वतां साधूंसी॥१३०॥ साधु कृपाळु जननी। जे अंतर जाणती तत्क्षणीं। तेथें परिहार कोणालागूनी। क्षणोक्षणीं सुचवावा॥३१॥ एका जनार्दना शरण। झालें मंदोदरीआख्यान। आतां रावणाचा यज्ञ। अति विलक्षण परियेसा॥१३२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सीतामंदोदरीसंवादो नाम पंचपंचाशत्तमोऽध्यायः॥५५॥ ओंव्या॥१३२॥

## अध्याय छप्पन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### लक्ष्मण व बिभीषण यांची श्रीरामांना विनंती

दूतांकडून अहिरावणवध ऐकून रावणाला चिंता : दूतवचनें रामचरित। अहिरावणाचा निजघात। ऐकोनियां लंकानाथ। तळमळित अति दुःखी॥१॥ मंदोदरी सीतेजवळी। पाठविली अति कुशळी। अतियुक्तीं प्रबोधिली[6]। कांही केलें तरी वश नव्हे॥२॥ जरी युद्ध करूं समरांगणीं। तरी राम नाटोपे रणीं। मस्तक पिटितां दशाननीं। कांहीं करणी चालेना॥३॥ ऐसा झाला चिंतातुर। काय करूं मी विचार। तंव आठवला महामंत्र। झाला शंकर प्रसन्न॥४॥ पूर्वी रावणांसीं वरद[7] । शिवें दिधला प्रसिद्ध। तें आठवलें विशुद्ध। होम अगाध मांडिला॥५॥

शब्दार्थ : १.अनुभव, २. कृपायुक्त झाला, ३. पूर्ण जडले, ४. स्मरण, ५. सत्य, ६. उपदेशिली, ७. वर.

करोनि शुद्ध स्नान। शंकर करावया प्रसन्न। मांडिलें अत्युग्र स्तवन। सावधान अवधारा॥६॥

अद्य रामाभिभूतोऽहं स्तुत्वा विषमलोचनम्। सर्वलोकहरं देवं त्रिपुरघ्नं त्रिसामगम्॥१॥

वरप्राप्तिसाठी रावणाची शिवाला प्रार्थना: आसनीं भोजनीं शयनीं। श्रवणीं वदनीं नयनीं। श्रीरामें व्यापिलें अनुदिनीं। क्षणक्षणीं न विसंबे॥७॥ धांव पाव गा शंकरा। त्रिपुरघ्ना[1] त्रिनेत्रा। सामगायनगंभीरागिरा। गौरीहरा पाव वेगीं॥८॥ ईशाना पंचानना वीरा। वरप्रभु वरखड्गधरा। नरनारीआदि चराचरा[2]। विश्वंभरा व्यापका॥९॥ वरशूळायुधधरा। वर सकलयोगीश्वरां। वर सुरां असुरां। अयुधप्रवरा धारका॥१०॥ चराचरा निजनित्या। सकळलोकशाश्वता। यज्ञमूर्ति यशभोक्ता। वरदात्या यज्ञांगा॥११॥ सुराध्यक्षा गणाध्यक्षा। देवाध्यक्षा वेदाध्यक्षा। योगपते योगाध्यक्षा। सर्वाध्यक्षा शूळपाणे॥१२॥ शरणागता शरण्य[3]। अभक्तासी करिसी दंडण। दक्षयज्ञविध्वंसन। स्वभक्तजनपाळका॥१३॥ पुष्पधनुष्यभंजना[4]। भाळनेत्र भवविनाशना। रुद्रविश्वजितअभिधाना। आधारस्थान विश्वाचें॥१४॥ जय चिताभस्मोद्धूलना। जय पिनाकी वरासना। चंद्रचूडा विश्वभूषणा। शत्रुहनना शंकरा॥१५॥ त्रिशूळखट्वांगधरा। नागभूषणा विचित्रा। वरदात्या वरेण्यवरा। वरकार्मुकधारका॥१६॥ असतां स्त्रियेसमवेत। ब्रह्मचर्य नित्यव्रत। परम योग हा अद्भुत। नित्य शोभत वीरासनीं॥१७॥ गंगाधर वेगसौम्य। भ्राजिष्णु[5] अव्यय परम। अंधकांत उग्रकर्म। मातृमंडलमध्यग॥१८॥ श्मशाननिलयरत[6]। रुंडमाळा कपाळहस्त। अनंगांतक शत्रुप्रमथ। कालकालांतक दुरासदा[7]॥१९॥ नीळकंठा दुर्धर्षा[8]। वृषभध्वजा वीरेशा। वृषस्कंधा वृषभाक्षा। श्रीमहेशा शाश्वता॥२०॥ वृषपते सर्वविजया। आनंद गिरिजाहृदया। कालचक्रप्रमेया। सुरवर्या सुरेशा॥२१॥ स्वामि शंकरा ऐक विनंती। सकळ कुळाची झाली शांती। मजही साधावया निश्चितीं। लागले आहेती सौमित्रराम॥२२॥ आसनीं भोजनीं शयनीं। गमनागमनीं कर्माचरणीं। राम लागला अनुदिनीं। क्षणक्षणीं सोडीना॥२३॥ श्रीरामबाणाचें भय पाहीं। मज लागलें सर्वां ठायीं। अहर्निशीं उसंत नाहीं। करूं कायी आतां मी॥२४॥ धांव पाव गा शंकरा। निजजनकरुणाकरा। मी पडिलों दुःखसागरा। धांव उदार शूळपाणे॥२५॥

रावणाला शंकराकडून वरप्राप्ती : ऐकोनि रावणाची करुणा। कळवळला कैलासराणा। प्रत्यक्ष होवोनि जाणा। काय रावणा अनुवादे[9]॥२६॥ शिव प्रत्यक्ष व्हावया जाण। अति खडतर रामानुसंधान। लागलेंसे बहुसाल जाण। भेटी त्रिनयना तेणें झाली॥२७॥ आश्वासोनि दशशिर। बोलता झाला शंकर। पहिलें प्रसन्न होवोनि सत्वर। दिधला वर तो ऐका॥२८॥ पूर्वी तुवां महावीरा। काढूनि सर्वांगाच्या शिरा। तुवां मस्तकाचा बरा। सज्जिलें यंत्रा अति युक्तीं॥२९॥

गांधर्वेण महाभाग कैलासे पर्वतोत्तमे। इदमाह महातेजा: शंकरो लोकपावन:॥२॥

गंधर्वयुक्तीं सामगायन। अति मधुर तुवां जाण। करून केलें मज प्रसन्न। वर संपूर्ण मागावया॥३०॥ युद्ध मांडिलिया समरांगणीं। वैरी जिणावया रणीं। प्रार्थिलें कैलासभुवनीं। विजयी त्रिभुवनीं व्हावया॥३१॥ तेणें काळें वरदान। तुज म्यां दिधलें आपण। तें स्मरोनियां जाण। करीं हवन अव्यग्र[10]॥३२॥ मजउद्देशें होम करितां। पावसी सकळ मनोरथा। झाली पाहिजे अविकळता। हेचि कठिणता मांडली॥३३॥ सिद्धि पावलिया अविकळ। तरी कार्य साधे तत्काळ। रथ पावसील प्रबळ। दिव्यतुरंगांसमवेत॥३४॥

---

शब्दार्थ : १. त्रिपुरासुराला मारणाऱ्या, २.स्थावर - जंगमात्मक सृष्टीला, ३. रक्षण करणारा, ४. कामदाहका, ५. सतेज, ६. निलय स्थान, ७. मिळण्यास कठिण अशा, ८. अजिंक्य, ९. बोलला, १०. निश्चित.

तत्र यो दृश्यते दिव्यो रथस्तुरगसंयुतः। ज्वलनार्कप्रतीकाशं कवचं च महाप्रभम्॥३॥
धनुर्माहेश्वरं चैव दिव्यं त्रिदशपूजितम्। मामकान्यपि चास्त्राणि ससंहाराणि सर्वशः॥४॥
प्राप्यान्ति तव दुर्धर्षं शरं करिकरोपमम्। तमारुह्य रथं दीप्तं सर्वास्त्रपरिवारितम्॥५॥
हनिष्यसि रणे शत्रून्यदि विघ्नो न ते भवेत्॥६॥

अग्निकुंडामाझारी देख। साश्वरथ अलोलिक। देखसी गा तात्काळिक। ज्वलनार्कसमप्रभ[1] ॥३५॥ अभेद्य कवच अति अपूर्व। शस्त्रास्त्रसामग्री सर्व। माहेश्वर चाप दिव्य। पावसी सर्व मदनुग्रहें[2]॥३६॥ सुपूजितें माझीं निजास्त्रें। संहारकारकें विचित्रें। पावसी तूं परिकरें[3]। शस्त्रास्त्रें दारुण॥३७॥ त्या रथावरी बैसोनि वेगीं। शस्त्रास्त्रें संयोगीं। युद्ध करितां रणरंगीं। वैरी भंगीं जातील॥३८॥ प्रेरिलिया वैरियावरी जाये। उपसंहारिल्या हातासीं ये। ऐसीं शस्त्रास्त्रें पाहें। प्राप्त होती रथावरी॥३९॥ होम निविघ्न सिद्धी जाय। तैं सिद्ध होय कार्य। कांही उठलिया अपाय। घात होय कर्त्याचा॥४०॥ ऐसें सांगोनि त्रिनयन। झाला अदृश्य आपण। येरें नमस्करोनि जाण। मनीं रावण संतोषला॥४१॥ आतां करोनियां याग। रथ पावेन अव्यंग[4]। शस्त्रास्त्रें अनेग। सकळ सांग पावेन॥४२॥ कोणा मनीं न धरवे सर्वथा। ऐसीं घोर कर्मे आचरेन आतां। पराजय पावे रघुनाथा। तैशा अर्था साधीन॥४३॥

एवमुक्त्वा महाबाहुः स्नात्वा जुहाव पावकम्। ब्राह्मणान्स्वस्तिवचनान्धनादिभिरतर्पयत्॥७॥
मुक्त्वा शोकं च मानं च मोहदर्पौ मदं तथा। आर्जवीं बुद्धिमास्थाय जपन्ब्रह्म सनातनम्॥८॥
रक्तसंवीतवसनो रक्तमाल्यानुलेपनः। रक्तयज्ञोपवीतश्च रक्त नेत्रकरस्तथा॥९॥
रम्यं शिवालयं पुण्यं प्रविवेशाथ रावणः। शिवमभ्यर्च्य मंत्रैस्तु तत्र कर्म समारभत्॥१०॥

रावणाची यज्ञासाठी तयारी : ऐसें बोलोनि महाबाहो। विध्युक्त स्नान केलें पहाहो। पुजोनि ब्राह्मणसमुदावो। स्वस्तिवचनलाहो पैं केला॥४४॥ देवोनि धनधान्यसंपत्ती। नाना रत्नांचिया जाती। विचित्र वसनें[5] द्विजांप्रती। लंकापति अर्पित॥४५॥ करोनियां स्वस्थांतः- करण। सांडोनियां मोह मान। पुत्रादिशोक दारुण। तोही जाण सांडिला॥४६॥ रावण श्रीरामाचा भक्त। रामीं प्रेमा अत्यंत। अंतरीं अनुराग[6] अत्यद्भुत। तेणें आरक्त सबाह्य॥४७॥ रक्तवस्त्रें परिकर। रक्तामाळा विचित्र। यज्ञोपवीत रक्तांबर। अत्युग्र आवरणपूजा॥४८॥ रक्तचंदनाची उटी परिकर। रम्य शिवालय मनोहर। तेथें बैसोनि दशशिर। होम एकाग्र आरंभी॥४९॥ रक्तांबरनेत्र दारुण। करोनियां शिवार्चन। दृढ स्मरे शिवचरण। होमविधान आरंभी॥५०॥ अति उग्र आवरणपूजा। यज्ञ राखावया वोजा[7]। करिता झाला रावणराजा। बळसमाजा परिसा पां॥५१॥ स्वस्थ रहावया अंतःकरण। समीप आनंदाचें आवरण। त्यामाजी मन घालितां जाण। विक्षेप[8] आपण रिघों न शके॥५२॥ सवेंचि दुसरा परिघ[9] पूर्ण। महामोहाचा दारुण। समीप पावतां पारिखे जन। मोहें निमग्न स्वयें होती॥५३॥ जे आवरणीं प्रवेशतां। मार्ग भुलिजे स्वधर्मता। कार्याठव हरपे सर्वथा। मोहनिमग्नता स्वयें होय॥५४॥ तिसरी संकल्पाची नदी। रावणें निर्मिली मंत्रसिद्धीं। जिच्या संकल्पाची अवधी। स्वयें विधि पावेना॥५५॥ वैरिया रिगम कैंचा तेथ। बुडती संकल्पविकल्पांत। गमनागमन न कळे तेथ। युद्धमात विसरती॥५६॥ ऐसें कठिण तिसरें आवरण। चौथा झंझामारुत[10] जाण। अंगी लागतांचि पूर्ण। अंगीं भग्न होय प्राणी॥५७॥ लागतां तेथींचा वारा। पारख्या उडवी अंबरा[11]। कोणा रिघों नेदी भीतरा। अद्भुत वारा आवरणीं॥५८॥ पांचवें बाह्यावरण। त्याचें विपरीत

शब्दार्थ : १. प्रदीप्त सूर्यासमान, २. माझ्या कृपेने, ३. सुंदर, ४. परिपूर्ण, ५. वस्त्रे, ६. प्रीती, ७. उल्हासे, आवडीने, ८. विकल्प, ९. आवरण, १०. झंझावात, ११. आकाशात.

क्षुधा संपूर्ण व्यापिजे ॥५९॥ आवरणभेद धरितां पोटीं। चिन्ह। जो भेदूं पाहे विदारून। कांही विचार न पडे दृष्टी। पडे सृष्टी मूर्च्छित ॥६०। यज्ञ राखावयाकारणें। अनिवार क्षुधा उठी। पंचकोश ज्यांतें म्हणणें। रचिले रावणे दुर्धर्षे ॥६१॥ हें पंचावरण जया अति उग्र पंचावरणें। आणीक आवरणें विविधें। परिस हृद्गत[1] सांगेन ॥६२॥ मंत्रावरण भेदे । अहंरावण तया साधे। भूत प्रेत वेताळ जाण। गुप्तावरण तयांचें ॥६३॥ बाहिर शस्त्रावरण। महाविखारांचें सर्पावरण। अहर्निशीं शस्त्रें हातींचीं। कैसीं झळकती परिधी[2] राक्षसांची । शस्त्रास्त्रीं बाणले कवची । राम साधावया सावचित्त। रावण होम असे करित। अंतरिक्षीं ॥६४॥ ऐसा अंतर्बाह्य निश्चित। समाहित[3] मानसें ॥६५॥

वानरसैन्यामध्ये रामनामाचा गजर व श्रीरामांना युद्धाला चलण्याची प्रार्थना: येरीकडे दळभारीं। सन्नद्धदळें कपिकेसरी। सन्नद्धबद्ध द्रुमकरी[4]। रामनामगजरीं गर्जत ॥६६॥ विजयी झाला रघुराज। मारिला अहिरावण दुर्बीज। उभारिला लांगूलध्वज[5]। कपिसमाज अति गजरें ॥६७॥ विजयी आमुचा कपिनाथ। मारोनियां पाताळनाथ। घेवोनि आला रघुनाथ। बळें अद्भुत हनुमंत ॥६८॥ करोनि कामाक्षी प्रसन्न। भेदोनि पाताळभुवन। मारोनियां राक्षसगण। श्रीरघुनंदन आणिला ॥६९॥ विजयी श्रीरामचंद्र। विजयी आमुचा हनुमान वीर। विजयी सकळ वानरभार। कपि समग्र नाचती ॥७०॥ कायसा रावण महावीर। कायसें लंकादुर्ग दुस्तर। मारावया दशशिर। वानरभार उपरमती[6] ॥७१॥ उठी चाल रघुनाथा। अद्यापि कायसी उदासता। क्षणें मारूं लंकानाथा। आळस परता सांडीं स्वामी ॥७२॥ म्हणोनि घालिती लोटांगणीं। लागती श्रीरामाच्या चरणीं। रावणकपटेंकरोनी। झाली भंगाणी[7] वानरां ॥७३॥ कपटेंकरीं वानर पडत। तुझ्या चरणरजें स्वयेंचि उठत। ऐसें क्षणोक्षणां घडत। तेणें बहुत दुःखरूप ॥७४॥ ऐसी गजबज करिती। अत्यंत येती काकुलती। युद्ध करावया रघुपती। प्रार्थिताती वानरें ॥७५॥

लक्ष्मणाचा श्रीरामांना रावणाचा वध करण्याविषयी आग्रह : तंव उठिला सुमित्रानंदन[8]। अत्यंत विनीत होऊन। प्रार्थिता झाला रघुनंदन। मधुर वचन बोलोनी ॥७६॥ ऐक स्वामी राघवा। तूं रघुकुलाचा ओलावा। निजभक्तजनविसांवा। वचनगौरवा परिसावें ॥७७॥ भक्त पडतां जन्मावर्तीं। निवारिता तूं रघुपती। तेथें कायसी युद्धख्याती। तूं त्रिजगती तारक ॥७८॥ तूं तारिसी नवल कोण। एकलें तुझें नाम जाण। उच्चारितां रघुनंदन। भवबंधन निवारे ॥७९॥ एवढा तुझा नाममहिमा। तो तूं जवळी असतां श्रीरामा। अत्यंत क्लेश प्लवंगमां। ते सर्वोत्तमा चुकवावे ॥८०॥ नाम स्मरतां रघुनाथें। निवारे भवभ्रमाची मात। तो तूं जवळी रघुनाथ। वानरा आकांत युद्धाचा ॥८१॥ एक एक गोळांगूळ। गिळूं शके ब्रह्मांडगोळ। तेथें कायसें रावणाचें बळ। युद्ध तुंबळ करावया ॥८२॥ तथापि कपटयोद्धा रावण। नाहीं युद्धधर्मीं आंगवण[9]। छळ छद्म करोनि जाण। वानरगण त्रासित ॥८३॥ जारण मारण स्तंभन। मोहन उच्चाटन वशीकरण। दुश्चित वैरी असतां जाण। सिंतरून मारावे ॥८४॥ ऐसा कपटयोद्धा दुरात्मा। संमुख येतां संग्रामा। रावण वधावया श्रीरामा। प्लवंगमां सोडवीं ॥८५॥ दुष्टदळणीं साचार। सत्य एक श्रीरामचंद्र। स्वयें धरिला अवतार। रावण किंकर तें किती ॥८६॥ तुझें ब्रीद पूर्वापर। करोनियां दुष्टसंहार। स्थापावे भक्त ऋषीश्वर। धर्म निरंतर रक्षावा ॥८७॥ सुख द्यावें जी दीजननां। प्रतिपाळावें गोब्राह्मणां। संरक्षावी भक्तसेना। रघुनंदना निजव्रता ॥८८॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥११॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥१२॥

---

शब्दार्थ : १. हृदयांतील, २. वेढा, ३. एकाग्र, ४. दातांत वृक्ष घेऊन, ५. पुच्छध्वजा, ६. आनंद पावतात, ७. नाश, ८. लक्ष्मण, ९. शक्ती.

श्रीरामांना लक्ष्मणाने प्रतिज्ञेचे स्मरण दिले व रावणाच्या दुष्कृत्यांची हकीगत सांगितली: तुझें निजव्रत श्रीरामा। दुष्ट प्रवर्तती अधर्मा। आच्छादिती स्वधर्मा। निंद्य कर्मा प्रवर्तत॥८९॥ धर्मवाढी निःशेष मोडे। अधर्माची शीग[1] चढे। सत्कर्माचा आवर्त[2] पडे। सद्भक्ति बुडे सशेंडी॥९०॥ ठसा पडे विपरीत। तिळतुल्य सत्कर्म आचरत। तेणेंच फुगारा[3] धरित। त्रिदोषीं पडत निजकर्में॥९१॥ अकर्माचा फुटे फांटा। अधर्माचा चढे ताठा। स्वैर करिती पापचेष्टा। गर्वाचा मोठा फुगारा॥९२॥ तापलीं त्रिविध तापें। वोसणती[4] विषयजल्पें। अहंममतेचे निजसंकल्पें। अति अमूपें पीडती॥९३॥ विषयरसें ओलावती। स्वयेंचि वियोगें सोकती[5]। क्षणक्षणें काकुलती येती। पाणी मागती विषयाचें॥९४॥ ते काळीं वैद्यरावो। अवतरसी रामरावो। ब्रह्मरसमात्रा देवोनि पहा हो। रोग स्वयमेवो झाडिसी॥९५॥ युगायुगाप्रती रामा। अवतरोनि मेघश्यामा। झाडा करिसी अधर्मा। पुरुषोत्तमा श्रीपते॥९६॥ अत्यंत रोगें पीडिले देखसी। तेव्हां विधीचे डाग देसी। सत्कथेचें पथ्य लाविसी। अनुपान लाविसी सत्संग॥९७॥ त्यासी दृढतेचें पथ्य। लाविसी सद्भक्तीसी नित्य। तेणें रोगाचें विगत[6]। होय निश्चित क्षणें एकें॥९८॥ ऐसे तुझे निजभक्त। अहंरावणरोगग्रस्त। त्यांसी करावया निर्मुक्त। सज्जीकृत करीं चाप॥९९॥ देव घातले बांदवडीं। सुरासुर देशधडी[7]। ऋषीश्वरें भ्यालीं बापुडीं। देवोनि बुडी लपलीं गिरिकंदरीं॥१००॥ नवग्रहांची केली पाउटी[8]। अग्नि धूतसे मळकटीं। विघ्नहर घेवोनि काठी। रासभांपाठी[9] राखणा॥१॥ मल्हारीदेव दावी दर्पण[10]। मुख्य चंडिका तराळी[11] जाण। कुंजें झाडी प्रभंजन[12]। मेघ सडासंमार्जन करीतसे॥२॥ इंद्र फुलारी वरुण बारी[13]। यम त्याचा नाटिकारी। चंद्र छत्रकार दाही शिरीं। दुर्दशा भारी देवांची॥३॥ भोजन करावया रावण। पाक निपजवी हुताशन। किंचित् आस्वाद चुकल्या जाण। करिती कंडण अग्नीसीं॥४॥ एवढी दुर्दशा देवां। ऐकतां त्रास उपजे जीवां। शीघ्र कुढवावे[14] देवां। भक्तां करावा उत्सावो॥५॥ आमची सीता माऊली। गुंफेमाजी एकली। आक्रंदत धरोनि नेली। गूढ राखिली अशोकवनीं॥६॥ एकवस्त्रा मलिन पाहीं। मलिन केश नाहणें नाहीं। दीनवदन भूमिशायी। धरिली कांही चालेना॥७॥ आला देखोनि हनुमंता। चरणांवरी लोळे सीता। मज भेटवीं रघुनाथा। शरण आतां तुज आलें॥८॥ ऐकतां तिचें करुणावचन। हृदयस्फोट होत जाण। मज द्यावें आज्ञापन। दशानन मारावया॥९॥ दारुण शस्त्रें आम्हांपासीं। तेव्हांचि मारितो रावणासी। क्षणक्षणां तूं निवारिसी। बळ स्वामीसीं चालेना॥११०॥ आतां तरी धरून पुरुषार्थ। निर्दळीं हा लंकानाथ। नाहीं तरी होईल अनर्थ। कपटें घात करील॥११॥ युगायुगाच्या ठायीं। श्रीराम अवतरोनि लवलाहीं। दुष्ट मारोनि सर्वही। भक्त लवलाहीं स्थापावे॥१२॥ ऐसी प्रतिज्ञा पूर्ण। वेदतुल्य तुझें वचन। तो वधोनियां रावण। भक्तसोडवण करीं स्वामी॥१३॥ मारोनियां खरदूषण। मुक्त करोनि जनस्थान। ब्राह्मणां दिधलें दान। हर्षे ऋषिगण नांदती॥१४॥ वाळी मारिला दारुण। मुक्त केलें किष्किंधाभवन। सुग्रीवासी दिधलें दान। सुखें वानरगण नांदती॥१५॥ ताटका पापिणी आपण। मार्ग रोधितां अति दारुण। ते विंधोनि मारिली बाण। मुक्तगमन मार्गस्थां॥१६॥ विश्वामित्रयागा जाण। केलें राक्षसीं रोधन। तेणें हर करोनि प्रसन्न। वरदान मागीतलें॥१७॥ मानवी सूर्यवंशाप्रती। राम अवतरेल दाशरथी। तो राक्षसां करोनि शांती। याग निश्चितीं राखील॥१८॥ त्या शिववरदासाठीं। तुवां एकलेनि जगजेठी। मारोनि राक्षसकोटी। ऋषिइष्टी संपविली॥१९॥ जे जे तुज शरण

---

शब्दार्थ : १. वृद्धी, २. भोवरा, ३. अभिमान, ४. बडबडतात, ५. सुकतात, ६. नाश, ७. बंधनात, ८. पायरी, ९. गाढवांमागें, १०. आरसा, ११. भारवाही, १२. वायू, १३. छत्रधर, १४. संरक्षावे.

आले। ते ते क्षणें कुढाविले[१]। तैसें साह्य पाहिजे केलें। बिभीषणालागोनी ॥१२०॥ एक बिभीषण शरणागती। दुसरे शरण सुरपंक्ती। तिसरी माऊली सीता सती। अति काकुळती येतसे ॥२१॥ वानरभारेंसीं जुत्पती। तुज येताती काकुळती। आपणही करितों विनंती। लंकापती मारावा ॥२२॥ तुझी प्रतिज्ञा रघुपती। रावण मारावा निजहस्तीं। ते आपलीं वचनोक्तीं। साच निश्चितीं करावी ॥२३॥ तुवां वाहिली असे आण। निजहस्तेंकरूनि रावण। स्वयें मारावा आपण। तें वचन आठवीं ॥२४॥

तां प्रतिज्ञां प्रतिज्ञाय पुरा सत्यपराक्रमः। लघुः कश्चिदिवासत्वो नैव त्यक्तुं त्वमर्हसि ॥१३॥
न प्रतिज्ञां हि कुर्वन्ति वितथां सत्यवादिनः। लक्षणं हि महत्वस्य प्रतिज्ञापरिपालनम् ॥१४॥
तदलं मास्तु ते वीर नैराश्यमुपगम्यते। वधेन रावणस्याद्य प्रतिज्ञामनुपालय ॥१५॥
न जीवन्यास्यते राम तव बाणपथं गमः ॥१६॥

लक्ष्मणाने सूर्यवंशामधील सत्यप्रतिज्ञ राजांची नावे व कृत्ये सांगितली : **सौमित्र म्हणे रघुनाथा। पूर्वप्रतिज्ञा आठवीं आतां। सत्यप्रतिज्ञा शाश्वता। होई आतां सन्नद्ध[२] ॥२५॥ तुजसारिखे सत्वसंपन्न। अन्यथा न करिती प्रतिज्ञावचन। रावण बापुडें हीन दीन। त्यासी विलंबन कायसें ॥२६॥ तुझ्या सूर्यवंशात। सत्यप्रतिज्ञ राजे बहुत। तयांमध्ये संकळित[३]। नामें सुनिश्चित सांगेन ॥२७॥ हरिश्चंद्र सूर्यवंशी। मिथ्या न करीच वचनासी। स्वप्रदान जागृतीसीं। देवोनि कैसी ख्याति केली ॥२८॥ निजराज्या देवोनि लात। एकाकी स्त्रीपुत्रसमवेत। निघता झाला त्वरित। स्वप्नवचनार्थसत्यत्वा ॥२९॥ स्वप्नदक्षिणेलागीं जाण। स्त्रीपुत्र दोघें विकून। डोंबाघरीं स्वयें आपण। जळवाहन[४] करीतसे ॥१३०॥ एकादशीव्रतालागीं जाण। निजपुत्राचें शिर कापून। मोहनीलागीं देई आपण। सत्यप्रतिज्ञ रूक्मांगद ॥३१॥ धर्मांगद त्याचा सुत। सत्यप्रतिज्ञ विख्यात। जनकभाकेलागीं[५] उद्युक्त। शिर छेदवित आपुलें ॥३२॥ स्वयें तुवांचि रघुनाथा। सत्यत्व यावया दशरथा। अंगीकारिलें महाव्रता। तीव्र आघाता साहोनी ॥३३॥ प्रार्थितां कौसल्या माता। उपेक्षोनि तिची कथा। वना निघालासी रघुनाथा। पितृवचनार्थालागूनी ॥३४॥ स्वहस्तें वसिष्ठ राज्य देतां। उपेक्षोनि गुरुवचनार्था। स्वराज्या हाणोनि लाता। वना तत्वतां आलासी ॥३५॥ अत्यंत करुणा भाकितां भरता। तुझें राज्य तुज देतां। उपेक्षोनि त्या प्रेमार्था। वना तत्वतां आलासी ॥३६॥ शिळीं[६] बुजोनि सागर। उतरोनि आणिला वानरभार। वेगीं वधोनि दशशिर। करीं राज्यधर बिभीषण ॥३७॥ तुझ्या बाणसंधानापुढें। रावण मशक बापुडें। सुटतां तुझें कुऱ्हाडें[७]। मरे रोकडें क्षणार्धें ॥३८॥ सिंह प्रवेशतां वनीं। होय मदगजां भंगाणीं[८] तेंवी रिघोनि राक्षसगणीं। रावणा अवनीं[९] पाडीं रामा ॥३९॥ उदया येतां दिवाकर[१०]। निशा हरपे सहित अंधार। त्रैलोक्यीं होय प्रकाशकर। स्वधर्माचार चालती ॥१४०॥ तेंवी रावणमोहनिशासुबद्ध। पडलें अधर्माचें गडद[११]। त्याचा छेदोनियां कंद। स्वधर्म विशद प्रकाशीं ॥४१॥ आपुल्या निजबाणकिरणेंकरीं। निरसीं रावणमोहअंधारीं। भक्तां नित्योदय करीं। स्वधर्मा करीं उद्धार ॥४२॥ ऐकोनि सौमित्रवचन। पोटांतिल्या हर्षे पूर्ण। बोलता झाला आपण। राजा बिभीषण रामासी ॥४३॥ राजा म्हणावया हेंचि कारण। सौमित्रें प्रार्थिला रघुनंदन। तेंचि निवटूनियां रावण। लंके बिभीषण स्थापिला ॥४४॥**

लक्ष्मणस्य तदा वाक्यं श्रुत्वा राजा बिभीषणः। उवाच हितमत्यंतं राघवं रघुनंदनम् ॥१७॥
एवमेतन्महाबाहो यथा वदति लक्ष्मणः। न प्रतिज्ञां हि कुर्वंति वितथां साधवो जनाः ॥१८॥

बिभीषणाने श्रीरामांना विनंती केली: **बिभीषणें घालोनि लोटांगण। विनविला रघुनंदन। जें**

शब्दार्थ : १. संरक्षिले, २. उद्युक्त, ३. थोडक्यांत, ४. पाणी वाहणे, ५. पित्याची प्रतिज्ञा शेवटास नेण्याच्या उद्देशाने, ६. दगडांनी, ७. बाण, ८. नाश, ९. पृथ्वीवर, १०. सूर्य, ११. काळोख, अंधार.

बोलिला सुमित्रानंदन। यथार्थ वचन तें रामा ॥४५॥ जें बोलिला लक्ष्मण। श्रीरामा तें सत्यवचन। तुझें नाम सत्यप्रतिज्ञ। वेदवचन प्रसिद्ध ॥४६॥ श्रीराम सत्य वेदु। श्रीराम सत्य साधु। श्रीराम सत्य बोधु। भवबंधु जेथ नाहीं ॥४७॥ श्रीरामें सत्य शास्त्र। श्रीरामें सत्य मंत्र। श्रीरामें सत्य कर्मतंत्र। होय सर्वत्र अव्यंग[1] ॥४८॥ श्रीरामें सत्य कीर्ती। श्रीरामें दृढ विरक्ती। श्रीरामें अढळ शांती। भक्त पावती भावार्थी ॥४९॥ श्रीरामें सत्य श्रुती। श्रीरामें सत्य स्मृती। श्रीरामें सत्य विश्रांती। भक्त पावती भावार्थी ॥१५०॥ तीर्थी व्रतीं क्षेत्रीं जाण। कामनापरत्वें देवतागण। त्यांच्या ठायीं जें सत्यपण। ते कृपा संपूर्ण रामाची ॥५१॥ जगतीतळीं जें जें सत्व। श्रीरामसत्वें तें सत्ववंत। ऐसा सत्यप्रतिज्ञ रघुनाथ। निजप्रतिज्ञा सत्य करीं स्वामी ॥५२॥ सज्ज करोनि चापीं गुण[2]। गुणीं प्रयोजोनि बाण। वधीं दुरात्मा रावण। धर्मरोधन करीतसे ॥५३॥

विध्वंसय शरैस्तीक्ष्णैर्दिवा च यदि वर्तते। प्रतिज्ञां रघुशार्दूल सफलां कुरु मानद ॥१९॥

अति तिखट बाणधारीं। रावणाचें देह विदारीं। जेंवी मदगजातें[3] चिरी। क्रोधेंकरी पंचानन[4] ॥५४॥ इंद्र वृत्रातें विदारी। मुरूलागी मुरारी। तेंवी रावणातें विदारीं। क्रोधेंकरीं। श्रीरामा ॥५५॥ मधूलागीं मधुसूदन। हिरण्यकशिपूतें सिंहवदन[5]। तैसा वधीं दशानन। क्रोधेंकरून श्रीरामा ॥५६॥ येच समयीं आजिंचे दिवसीं। वेगीं धनुष्यातें हातवशीं[6]। मारोनियां रावणासी। करीं सकळांसीं उत्सावो ॥५७॥ ऐकोनि शरणागतवचन। आणि बंधूची विनवण। बोलता झाला रघुनंदन। निजजनकृपाळु ॥५८॥ एका जनार्दना शरण। सौमित्रा बिभीषणा जाण। देवोनियां समाधान। यागविध्वंसन करील ॥५९॥ राम शरणागता वत्सळु। राम निजजनस्नेहाळु। आर्तत्राणप्रतिपाळु। रणकल्लोळु श्रीराम ॥१६०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सौमित्रबिभीषणविज्ञापनं नाम षट्पंचाशत्तमोऽध्यायः ॥५६॥ ओंव्या ॥१६०॥ श्लोक ॥१९॥ एवं ॥१७९॥

## अध्याय सत्तावन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### राक्षसांच्या आवरणाचा भेद

लक्ष्मण व बिभीषणाच्या भाषणाने श्रीरामांना क्रोध व बिभीषणाला रावणाच्या शोधाची आज्ञा:

बहुतांपरी लक्ष्मण। विनविता झाला रघुनंदन। तैसेचि बिभीषणही जाण। करी विनवण बहुतांपरी ॥१॥ विनविला वानरीं। महावीर कपिकेसरीं। ऐकतां तिखट उत्तरीं। कोप रघुवीरीं पैं आला ॥२॥ त्रिपुरवधालागीं झडकरीं। क्रोध आला त्रिपुरारी। त्याहूनि क्रोध रघुवीरीं। दशशिरा वधावया ॥३॥ मुरु दैत्य दुर्धर भारी। त्यालागीं खवळे मुरारी। त्याहूनियां कोप रघुवीरीं। दशशिरा मारावया ॥४॥ सृष्टिप्रळयाचे वेळे। संहारकाळ अति खवळे। तेंवी छेदावया रावणशिसाळें[7]। क्रोध खवळे श्रीरामीं ॥५॥ ज्याची विक्षेपभृकुटी[8]। क्षणें विध्वंसी ब्रह्मांडकोटी। तो निवटावया[9] दशकंठी[10]। राम जगजेठी खवळला ॥६॥ अत्यंत कोपें कोपायमान। बोले बिभीषणासी वचन। कोठें आहे तो दशानन। वेगें शोधून मज सांगा ॥७॥ रणीं पळाला पाठी देऊन। तो रणा न येतां दशानन। केंवी मारावा आपण। लागे दूषण धर्मयुद्धा ॥८॥ आतां तुवां करावें एक। चार[11] पाठवून आवश्यक। कोठें आहे दशमुख। वृत्त सकळिक आणावें ॥९॥

---

शब्दार्थ : १. पूर्णपणे, २. दोरी, ३. मदोन्मत्त हत्तीला, ४. सिंह, ५. नृसिंह, ६. हातात घे. ७. रावणमस्तके, ८. वाकडी भुवई, ९. मारण्यास, १०. रावण, ११. हेर.

क्वासौ लंकेश्वरः क्षुद्रो रावणो दुर्मदः खलः। रणभूमिं परित्यज्य कुत्रास्ते किं च चेष्टितम्॥१॥
बोद्धव्यः स त्वया वीर शीघ्रमेव ममाज्ञया। राघवस्य वचः श्रुत्वा चारैरन्विष्य सर्वतः॥२॥

बिभीषण सर्वज्ञ। शिष्ट चार पाठवून। कोठें आहे तो रावण। काय आचरण करिताहे॥१०॥ कपटी दुरात्मा[1] रावण। अहंमते मातला पूर्ण। शेखीं रणभूमी सांडून। जीव घेऊन पळाला॥११॥ त्याचें समूळ ताळतंत्र। क्रियाविधानसमाचार। मानसीं आणून समग्र। सविस्तर मज सांगा॥१२॥

बिभीषणाने चार दूतांमार्फत रावणाचा शोध करून वृत्तांत सांगितला : बिभीषणा अति त्वरेंसीं। वेगीं आणीव वृत्तांतासी। ऐसें सांगतां श्रीरामासीं। येरु[2] मानसीं तोषला॥१३॥ तंव श्रीरामाज्ञेपूर्वी जाण। चार वेगीं पाठवून। लंकेमाजी झाडा घेऊन। वृत्तांत पूर्ण आणविला॥१४॥ तें रावणाचें चेष्टित[3]। श्रीरामापुढें सांगत। विनविता झाला यथातथ्य। अति विनीत बिभीषण[4]॥१५॥

उवाच वचनं धीमान्राममेतदबिभीषणः। शक्त्या निर्भिद्य सौमित्रिं क्रूरकर्मा स रावणः॥३॥
स विवेश पुरीं तूर्णं लंकामेव सहानुगः। सोऽवतीर्य रथत्तूर्णं वधमिच्छति तेऽनघ॥४॥
चिंतयामास काकुत्स्थो वरदानं महात्मनः। दत्तं स्वयंभुवा पूर्वं सर्वशत्रुविनाशनम्॥५॥
अजेयं सप्तभिर्लोकैः ससुरासुरमानवैः। रथं सर्वायुधोपेतं दिव्यमद्भुतदर्शनम्॥६॥
युक्तमस्त्रैर्महावेगैः कामगैः कामरूपिभिः। अभेद्यकवचं चापि सर्वास्त्रैरभिसंगतैः॥७॥

घालोनियां लोटांगण। विनविता झाला बिभीषण। रावणचेष्टा संपूर्ण। श्रीरघुनंदन परिसत॥१६॥ कपटी क्रूरकर्मा रावण। सौमित्रासीं शक्ति भेदून। युद्ध न करितां आपण। गेला पळोन लंकेमाजी॥१७॥ उतरोनि रथाखालता। तुझ्या ध्यानीं लंकानाथा। अति आकांत वर्तला चित्ता। श्रीरघुनाथा तें ऐक॥१८॥ करूं जातां भोजन। गोड न लागे तया अन्न। त्यासी दिसे रघुनंदन। अति दारुण शस्त्रपाणी॥१९॥ करूं जातां उदकपान। राम जीवना जीवन। देखोनियां दशानन। चळकांपें जाण कांपत॥२०॥ तांबूल घेतां लंकानाथा। सेवकांमाजीं देखे रघुनाथा। हातीं धनुष्य पाठीसीं भाता। झाला देखता रावण॥२१॥ स्त्रीगृहामाजी पाहीं। राम देखे सर्वां ठायीं। शयनशेजेतेंही। दिसे लवलाहीं श्रीराम॥२२॥ स्नान मार्जन सकळ भोग। गमनागमनवेग। कर्माकर्माचें अंग। भासे सवेग श्रीराम॥२३॥ भयेंकरोनि लंकानाथा। प्राण जावा सर्वथा। भाग्य फळासी आलें तत्वतां। शंकर चित्ता आठवला॥२४॥ रामभय अति खडतर। रावणा लागलें अति दुर्धर। तेणें आठवला शंकर। चित्तचमत्कार वचन ज्याचें॥२५॥ पूर्वी उग्र तप करून। रावणें हर केला प्रसन्न। मागितलें वरदान। शत्रुहनन करावया॥२६॥ तेंचि ये काळीं आतां। सांगितलें लंकानाथा। तेणें पावोनि उल्लासता। होम करिता पैं आला॥२७॥ त्या होमामाजी रथ। साश्वशस्त्रास्त्रीं संयुत। अभेद्य कवच अद्भुत। समवेत दिव्यायुधें॥२८॥ विचित्र कामग[5] अस्त्रें। सकळलोकसंहारकरें। प्रेरिलिया वैरिसंहारें। येती उपसंहारें हातासीं॥२९॥ ऐसें शिवाचें वरदान। अनुस्मरोनि रावण। करिता झाला हवन। तुझें हनन करावया॥३०॥ परी त्याहीमाजी अतर्क्य चिन्ह। शिव सर्वात्मा सर्वज्ञ। प्रकट सांगीतली खूण। मूर्ख रावण जाणेना॥३१॥ अविकळ सिद्धि पावे होम। तैं वैरियाचें होय भस्म। अल्प विकळ होतां परम। अति दुर्गम कर्त्यासीं॥३२॥ विकळ होतां यागासी। समूळ घात कर्त्यासी। ऐसें सांगोनि रावणासी। गेला निजधामासी शंकर॥३३॥ मूर्खा रावणा अहंबुद्धी। म्हणे अविकळ पाववीन सिद्धी। राम सौमित्र माझे द्वंद्वी[6]। बाणवेधीं निवटीन॥३४॥ ऐसा करोनि निर्धार। करीतसे कमतंत्र। अति सावध एकाग्र। यज्ञोपचार घेवोनी॥३५॥ अति उग्रें सप्तावरणें। रावणें रचिलीं दारुणें। कोणा न करवती गमनें। अति दारुणें परीस पां॥३६॥ अहंबुद्धि रावण। आपणासीं

शब्दार्थ : १. दुष्ट, २. दुसरा (बिभीषण), ३. कृत्ये, ४. नम्रतेने, ५. इच्छिले स्थळी जाणारी, ६. वैरी.

अति गूढ रक्षण। पंचकोश पंचावरण। रचिलें जाण श्रीरामा॥३७॥ आणिकही महादारुण। मंत्रावरण शस्त्रावरण। भूतप्रेत पिशाच जाण। अति दारुण किळकिळित॥३८॥ शाकिनी डाकिनी महाशक्ती। अहर्निशीं सावचित्तीं। रावणाचा याग राखिती। महासर्प देती धुधु:कार॥३९॥

**रावणाच्या होमामध्ये विघ्न आणण्याचा बिभीषणाचा श्रीरामांना सल्ला:** ऐसा अति बळे बळवंत। रावण यास असे करित। वधावया रघुनाथ। अति उद्यत साक्षेपें[1]॥४०॥ अविकळ सिद्धी गेलें हवन। तरी कोणासी नागवे रावण। वैरी निर्दळोनियां जाण। विजयी पूर्ण होईल॥४१॥ ऐकें स्वामी रघुनाथा। होम करितां लंकानाथा। विघ्न करावें जाऊनि आतां। विलंब सर्वथा नये करूं॥४२॥

तस्य होमस्य कालोऽयं देवायतनमास्थित:। जुहोत्यग्निं समाधिस्थो रौद्रैर्मंत्रैर्महायशा:॥८॥
तस्य पापस्य तत्कर्म न सिध्यति दुरात्मन:। तस्य तावत्त्वया वीर विघ्नं कार्यं बलीयसा॥९॥
अवध्य: स भवेत्तस्मिन्कृते कर्मणि राक्षस॥१०॥

आजि होमाचा होमकाल। रावण साधितसे अविकळ[2]। आपण होवोनि निश्चळ। विघ्न तत्काळ करावें॥४३॥ केवळ रुद्र क्रोधान्वित। ऐसें उग्र कर्म आचरत। रुद्रमंत्रें होम करीत। सावचित्त रावण॥४४॥ होमाचा समीप काळ। आणि फळप्राप्तिवेळ। रावणा साधों आली सकळ। साश्वरथसंयुक्त॥४५॥ येचि काळीं आपण। रावणासी करोनि विघ्न। विध्वंसिलिया हवनं। निजकार्य जाण साधेल॥४६॥ ऐसें न करितां आपण। जरी सिद्धी गेलें हवन। तरी सर्वथा अवध्य रावण। सत्य जाण रघुनाथा॥४७॥ ऐकतां बिभीषणवचन। सर्वांगीं दाटलें स्फुरण। एकला आक्रमी त्रिभुवन। ऐसा रघुनंदन भासत॥४८॥

बिभीषणस्य तद्वाक्यं घोरं श्रुत्वा भयावहम्। ततो रामो महातेजा: सबलं चापि वीक्ष्य च॥११॥
माल्यवंतं सुषेणं च गवाक्षं गवयं तथा। आज्ञापयामास तदा विघ्नार्थं दश यूथपान्॥१२॥
अंगदं च हनूमंतं शरभं गंधमादनम्। ऋक्षं सेनापतिं चैव नीलं चापि महाबलम्॥१३॥
लब्धसंज्ञा महावीर्या यूथपा: कृतनिश्चया:॥१४॥

**श्रीरामांनी वानरसेनापतीला लंकेमध्ये पाठविलें :** सकळलोकभयकारक। रावणाचें कर्म देख। येतांचि रघुकुळटिळक। निजबाहुकौतुक पाहूं इच्छी॥४९॥ उसणया[3] घायीं रावणासीं। भिडावया निजमानसीं। अति उल्लास राघवासीं। बाहेर त्यासी काढूं पाहे॥५०॥ बाहेर काढावया रावण। सेनापति दहा जण। अति बळियाढे वानरगण। श्रीरघुनंदन धाडित॥५१॥ ज्यांचा ऐकतां प्रताप। काळासीं सुटे चळकांप। रावण बापुडें तें अल्प। त्याचा प्रताप तो किती॥५२॥ जयांचा अंतका भेदारा[4]। काम जयांचा तोडरा[5]। यम कांपे थरथरां। ते दशशिरावरी चालले॥५३॥ जे राक्षसांतें करिती अंत। जे दृष्टी दानवांतें नाणित। भूतगण चळीं कांपत। शक्ति येत लोटांगणीं॥५४॥ महावीरां दृष्टी नाणित। तो निघाला माल्यवंत। ज्याचा लागतां घात। होय भस्मांत राक्षसां॥५५॥ देखोनियां महारण। रणमदें डुले आपण। युद्धीं सुखावें संपूर्ण। तो सुषेण निघाला॥५६॥ दृष्टीं पडतांचि अल्प। पळती गाईंचे कळप। ते केवीं साहती झडप। तो सिंहप्रताप गवाक्ष॥५७॥ गवयही तैसाचि जाण। गार्यींचे परी वैरिगण। वळितां न लगे अर्ध क्षण। तोही आपण निघाला॥५८॥ वानरसैन्याचें मंडण। तो युवराज आपण। जेणें अपमानिला रावण। तो अंगद जाण निघाला॥५९॥ वणवा लागल्या डोंगरीं। जळती टोळांचिया हारी। तेंवी निवटिता राक्षसवैरी। शरभ निर्धारीं चालिला॥६०॥ ऋक्षसेना आणि

---

**शब्दार्थ :** १. प्रयत्नाने, २. अविघ्न, ३. समोरासमोर भिडून, ४. भीती, ५. अंकित.

वानर। उभयसेनेचे सेनाधर। नीळ आणि जांबवंत वीर। ज्यांचा धाक थोर रावणा॥६१॥ सकळ वीरांमाजी मुखरणी[1]। जो रणयोद्ध्यांचा अग्रगणी। जो राक्षसां करितसे भंगाणी[2]। मुख्य रावणीं धाक ज्याचा॥६२॥ जो श्रीरामाचा लाडका। अत्यंत प्रिय रघुनायका। ज्याचा भेदरा दशमुखा। जो तिहीं लोकां निजपूज्य॥६३॥ जो श्रीरामाचें अंगत्राण[3]। जो जानकीशोकविध्वंसन। जो वानरांचा निजप्राण। तो हनुमान जाण चालिला॥६४॥ जो सौमित्रप्राणरक्षिता। जो बिभीषणा अभयदाता। जेणें घोळसिलें लंकानाथा। तो हनुमान तत्वतां चालिला॥६५॥ जेंवी साधनचतुष्टयसंपत्ती। अधिष्ठात्री वश्य होती। तेंवी बिभीषणसाह्यार्थी। दहाही सेनापती निघाले॥६६॥ श्रीरामाज्ञा वंदोनि शिरीं। यूथपसेना[4] वानरहारीं। करावया रावणबोहरी। कपिकेसरी चालिले॥६७॥ श्रीरामकार्जी निश्चय पूर्ण। धरूनियां वानरगण। निघते झाले आपण। गेलियाही प्राण न सरती॥६८॥ जयजयकारें गर्जत। शिळा पर्वत झेलित। रामनामें किराण[5] देत। वीर उपरमत[6] द्रुमपाणी[7]॥६९॥ जेंवी अक्षोभ्य सागर। तेंवी अक्षोभ्य वानरभार। करीत रामानामाचा गजर। वानरभार चालिला॥७०॥ मर्यादें नेमिला सागर। अमर्याद वानरभार। सागरीं लहरीं अपार। तेंवी उठावले थोर वानर॥७१॥ सागरीं कांसवांचे भार। तेंवी वानरीं गिरिवर। सागरीं तळपती महानक्र। शिळाशिखरें वानरीं॥७२॥ सागरीं तळपती महामीन। सैन्यसागरीं द्रुम जाण। वानरें देवोनि किराण। तळपती पूर्ण सैन्यांत॥७३॥ ऐसा उद्भट सैन्यसमुद्र। गर्जत चालिले वानरभार। करीत नामाचा गजर। वानरवीर चालिले॥७४॥ रामनामाचा कल्लोळ। तेणें व्यापिला भूगोळ। नादें कोंदलें अंतराळ। दिग्मंडळ गर्जत॥७५॥ नाम भरतांचि गगनीं। गेलें शून्यत्व उडोनी। चैतन्यघन होउनी। आलें पिकोनी रामनाम॥७६॥ स्वर्गपाताळांच्या ठायीं। नाम कोंदलें लवलाहीं। गेलें बुडोनि लोकत्रयीं। नाम पाहीं रामाचें॥७७॥ श्रीरामाची निजशक्ती। वानरांअंतरी रामनामकीर्ती। तेणे कळिकाळा न गणिती। करीत ख्याती निघाले॥७८॥

क्षणात्संप्राप्य नगरीं लंकां रावणपालिताम्। प्राकारदथ चोत्पत्य विविशुस्ते प्लवंगमाः॥१५॥

वानरसेनापतींचा लंकेमध्ये प्रवेश व धुमाकूळ : श्रीरामबळें बळवंत। कळिकाळा दृष्टी नाणित। निघाले नामें गर्जत। रावणा अंत करावया॥७९॥ क्षणामाजी वानरगण। पावते झाले लंकाभवन। अतिशयें शोभयमान। देखतां मन विस्मित॥८०॥ जियेसीं न तुके[8] अमरावती। कुबेराची अलकावती। तेथें उपमा सांगों कोणती। विस्मित चित्तीं सुर सिद्ध॥८१॥ इतरें कृति नाहीं केली। स्वयें विश्वकर्म्यानें रचिली। शंकरकृपें रूपा आली। ते केंवी बोलीं बोलवेल॥८२॥ पताका पल्लव छत्रें। मुक्तघोसें परिकरें[9]। रत्नखचित गोपुरें। अति विचित्रें भासती॥८३॥ चौबारे हाटवटिया[10]। पाचू पेरोजे मोहटिया। हिरेनिबद्ध उथाळिया। खांब तयां गोमेदाचे॥८४॥ माणिक पाचू हिरकणें। कांचननिबद्ध अंगणें। दोहीं बाहीं गुढिया तोरणें। तेणें दुकानें शोभती॥८५॥ वर्णितां तेथींची महिमा। मन विसरे मनोधर्मा। स्वयें कर्ता विश्वकर्मा। तेथें उपमा काय द्यावी॥८६॥ वरी कृपा शंकराची। अनुपम उपमा तेथींची। आणि वस्ती रावणाची। सीमा भाग्याची कोण जाणे॥८७॥ एवढा भाग्याचा बडिवार। जेणें धिक्कारून कुबेर। वसविलें लंकापुर। प्रसन्न शंकर करोनी॥८८॥ वरदमदें पूर्ण मातला। सेव्यासेव्यातें विसरला। निजमूळातें चुकला। तेणें तयातें क्षोभला शंकर॥८९॥ माझा स्वामी श्रीरघुनाथ। त्याची कांता चोरोनि नेत। समूळ याचा करीन

---

शब्दार्थ : १.श्रेष्ठ, प्रमुख, २. मोड, नाश. ३. अंगरक्षक, ४. सेनापतींचा समुदाय, ५. उड्या, ६. आनंद, ७. हातांत वृक्ष घेतलेले असे, ८. तुळे, ९. सुंदर, १०. बाजार.

घात। म्हणोनि प्रेरित वानर॥९०॥ जेथें परिघ[1] सागराचा। गूढ पर्वत त्रिकूटाचा। वरी कोट लंकेचा। तेथें वानरांचा प्रवेश॥९१॥ रिघोनि लंकेभीतरीं। पताका फाडिल्या वानरीं। ध्वजा पाडिल्या झडकरीं। अपांपरी[2] तोरणां॥९२॥ सांदींबिदीं मुक्ताघोस। रत्नें विखुरलीं असमसाहस। वानर न पाहती त्यांस। विरक्त रत्नांस रामनामें॥९३॥ श्रीरामभजनीं जे विमुख। त्यांसी द्रव्यदारेचें अति सुख। जिहीं सेविला रघुकुळटिळक। त्यांसी नित्य सुख श्रीरामें॥९४॥ राजहंसापुढें शेण। तेंवी रामभक्तां द्रव्य जाण। त्यांपुढें न पाहती ढुंकोन। तेथें अभिलाषण तें कैंचे॥९५॥ जेंवी श्वान भक्षी वमन। देखतां कंटाळे मन। तेंवी न पाहीत ढुंकोन धन। भक्तजन रामाचे॥९६॥ त्याचपरी निश्चितीं। स्त्रीलोभाचीही गती। भक्त दृष्टी नाणिती। जडली वृत्ती श्रीरामीं॥९७॥ यापरी भक्त जाण। महावीर वानरगण। दृष्टीं न पाहती ढुंकोन। करीत कंदन निघाले॥९८॥ तोरणें तोडिताती एक। एक फाडिती पताक। ध्वजा उपडोनियां देख। मारीत लोक निघाले॥९९॥ एक हाणोनियां लाताडें। फोडून सांडिती कवाडें। केले दारवंटे उघडे। आलीं माकडें मारीत॥१००॥ एक उपरमाया[3] उडती। दुर्गींचे धोंडे उचटिती। पाडोनि सांडिल्या भिंती। अद्‌भुत शक्ती वानरां॥१॥ करीत आले महामारी। रोधोनि राहिले पाणबारी[4]। आकांत होत नरनारी। दशशिरी निमाला॥२॥ मारीत आलें वानरसैन्य। केलें नगरासीं कंदन। बाहेर निघेना रावण। अद्यापि हवन तें कायी॥३॥ बोंब सुटली घरोघरीं। स्त्रियां बाळा अपांपरी। देखोनियां निशाचरीं। वानरभारीं मिसळलें॥४॥ तंव अति बळी कपिकुंजर। पुढें करोनि पवनपुत्र। युद्धा मिसळले सत्वर। केला संहार राक्षसां॥५॥

हनूमंतं पुरस्कृत्य सर्वे युद्धाय तस्थिरे। राक्षसाश्च महावीर्याः प्रासासिपरिघशयुधाः॥१६॥
दंशितास्तस्थिरे सर्वे युद्धायामितविक्रमाः। बलेनान्योन्यमासाद्य युयुधुस्ते परस्परम्॥१७॥

परिघपट्टिशगदापाणी। लहुडीमुद्गलधनुर्बाणी। खड्ग त्रिशूळ तोमर घेउनी। राक्षसश्रेणी निघाल्या॥६॥ परिघ हाणिती निशाचर। वृक्ष झेलिती वानरवीर। हात लचकोनि सत्वर। भूमीवर आदळले॥७॥ वानर वृक्ष हाणिती। राक्षस मारिती परिघाप्रती। करोनि परिघाची उपहती[5]। हात मोडिती राक्षसांचे॥८॥ श्रीरामनामें उपरमती। राक्षसां संहार करिती। राक्षस गदा हणिती। वानर झेलिती शिळाशिखरें॥९॥ शिळाघातें गदा पाहें। पीठ होवोनियां जाये। वानर वांकुल्या दाविती स्वयें। न धरिती भय राक्षसांचें॥११०॥ एक चालिला शूळ घेउनी। वानर देखोनि शिळापाणी। हाणितांचि वानरगणीं। घेती हिंसडोनी शूळातें॥११॥ शिळा हाणितां अवचितीं। राक्षस अंगेसहित अस्थी। मिळोनि जाती अव्यक्तीं। जाती व्यक्ती उरेना॥१२॥ एक घेवोनि येती भाले। खड्गतोमरेंसी एक आले। कुठारहस्तीं एक चालिले। एकीं मांडिलें द्वंद्वयुद्ध॥१३॥ एक हाणिती मुसळें। वानर हाणिती शालताळें। तेथें घोरांदर मांडलें। कंदन झालें तुंबळ॥१४॥ भाले ओपिती निशाचर। अंगें भिडती वानर। घाय न मानोनि समग्र। करिती संहार राक्षसां॥१५॥ खड्ग हाणिती निशाचर। दुधडे होती वानर। प्रवाहे रुधिरधार। तें कपिकुंजर न गणिती॥१६॥ श्रीरामनामतेजेंकरीं। अतिप्रताप कपिकेसरी। दुधड[6] झाले शरीरीं। ते पुच्छेंकरीं गुंडिती॥१७॥ सवेंचि मिसळती युद्धासीं। हिरोनि घेती खड्गांसी। तेणेंचि मारिती राक्षसांसी। वानरीं ऐसी ख्याति केली॥१८॥ मारोनियां निशाचर। नामें देती भुभुःकार। तेणें गर्जत अंबर। आकांत थोर राक्षसां॥१९॥ हाणितां भिंडिमाळा[7] पांगोरे। गुंडे झेलिती वानरें। फिरवोनि तेणेंचि करें। निशाचर मारिती॥२०॥ नानापरींचीं आयुधें। आणिक शस्त्रास्त्रें विविधें। मंत्रतंत्रादि सन्नद्धें। अति

शब्दार्थ : १. वेढा, २. दाणादाण, ३. उल्लासित होण्यास, ४. पाणिवठे, ५. नाश, ६. भिन्नांग, ७. गोफणी.

सुबद्धें वर्षती ॥२१॥ वानरांच्या निजचित्तीं। श्रीरामतेजें दुर्धर शक्ती। तेणें कळिकाळा नागवती। केली शांती[1] सकळांची ॥२२॥ युद्धीं खवळले वानर। करीत उठिले संहार। निवटिले राक्षसभार। वाहे रूधिर भडभडां ॥२३॥ एकांचे करचरण तुटले। एकांचे कटी भंगले। एकांचे ऊर फुटले। उघडे पडिले कोथळे ॥२४॥ मल्लयुद्ध परस्परीं। झोंटधरणी[2] महावीरीं। गुडघे कोंपर टोले शिरीं। महामारी राक्षसां ॥२५॥ मुद्रिकांसाठीं बोटें मोडिती। अंगदांसाठीं बाहु तोडिती। कुंडलांसाठीं कान उपडिती। माथे तोडिती मुकुटांसाठीं ॥२६॥ करोनियां घोरांदर। खवळले वानरेश्वर। मारिले निशाचर। रक्तनदी दुस्तर लोटली ॥२७॥

निपेतुर्भुतले भिन्नाः केचिदुधिरकर्दमे। रक्षांसि च तथा पेतुर्वानरैर्भीमविक्रमैः ॥१८॥
चूर्णिता विविधैः शैलैः पादपैर्मुष्टिभिस्तदा। दारिताश्च नखैस्तीक्ष्णैर्दंतैरपि सुदारुणैः ॥१९॥
तत्र वृत्तं महायुद्धं कबंधीभूतसंकुलम्। शूराणां हर्षजननं भीरूणां च भयावहम् ॥२०॥
तर्षणं सुरनारीणां सर्वदुःखविमोक्षणम्। तस्मिन्युद्धे महाघोरे रक्षोवानरसंक्षये ॥२१॥
प्रावर्तत नदी घोरा शोणितोदकवाहिनी ॥२२॥

वानरीं केलें महारण। कबंधी दाटलें नभस्थान। नखीं केलें विदारण। मांसे रणांगण कोंदलें ॥२८॥ दांती डसून गोळांगुळें। काढोनि घेती अन्त्रमाळें[3]। तेणें ओविती शिसाळें[4]। पाळिती लळे भूतांचें ॥२९॥ वर्षतां शिळापाषाण। द्रुमांचे घाय दारुण। केलें राक्षसांचे चूर्ण। कर्दम पूर्ण रणांगणीं ॥१३०॥ गजांचिया करवडी[5]। त्याचि रणनदीसीं दरडी। कर्दम दाटला बुडीं। मांसरक्तपरवडीमिश्रित ॥३१॥ रुधिर वाहे भडभडां। तो नदीस पूर गाढा। वोसणें[6] दाटलीं दोहीं कडां। विचित्र युद्ध बहुवस ॥३२॥ सचक्र वाहती रथ। तेंचि तारूं नदीआंत। सपल्लव ध्वज शोभत। शीड तेथें तेंचि देखा ॥३३॥ गजकरवडी पडिल्या तळीं। त्याचि सुसरी विक्राळी। भयानक मुखें पसरिलीं। दिसती अवाळीं चाटित ॥३४॥ सलंब भाले वाहती। ते महानक्र नदीप्रती। सपिच्छ बाण तळपती। तेचि निश्चितीं महामीन ॥३५॥ महावीरांची वोढणें। तींच कांसवें पैं दारुणें। अंबरें वाहती वितानें[7]। तेणें फेणें दाटली नदी ॥३६॥ विकासलीं मुखकमळें। वाहती नरशिसाळें। तींच नदीमाजी उत्पळें[8]। केश उभारले केशरप्राय ॥३७॥ जे पळोनि जाती रणीं। त्यांसी जैसी वैतरणी। भासतसे क्षणक्षणीं। भयवाहिनी दारुण ॥३८॥ श्रीरामभक्तांचें हातीं। जे समरांगणीं निमती। त्यांसी सुरांगना वानिती। ओंवाळिती आरत्या ॥३९॥ महापाप्यातें दुस्तर। निजकर्मे उतरावया पार। तेथें तारूं श्रीरामचंद्र। नामें परपार पाववी ॥१४०॥ श्रीरामनामें निजनेटीं। वानरीं मारिल्या कोट्यनुकोटी। कोणी संमुख न राहती नेटीं। उठाउठीं पळालें ॥४१॥ निवटून राक्षसगण। विजयी झालें वानरसैन्य। भेदिलें वीरांचें आवरण। रणनदी पूर्ण वाहवोनी ॥४२॥ रण देखोनि घारी गीध। करिते झाले आल्हाद। भोजन मिळालें अगाध। मांस विविध भक्षिती ॥४३॥ ऐसें करोनियां रण। भेदोनि असुरांचें आवरण। पुढें चालिले वानरगण। तंव महादारुण ओढवलें ॥४४॥ नभीं गुप्त शस्त्रावरण। भूत प्रेत पिशाच जाण। भेदितील वानरगण। रघुनंदननिजकृपा ॥४५॥ एका जनार्दना शरण। दुर्धरक्रिया रावण। रची जितकी दारुण। तितकी श्रीरामगण भेदिती ॥१४६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां राक्षसावरणभेदो नाम सप्तपंचाशत्तमोऽध्यायः ॥५७॥ ओंव्या ॥१४६॥ श्लोक ॥२२॥ एवं ॥१६८॥

---

शब्दार्थ : १. नाश २. एकमेकांच्या शेंड्या धरून, ३. आंतडी, ४. मस्तके, डोकी, ५. प्रेते, ६. पूरातील केरकचरा, ७. छते, ८. कमळे.

# अध्याय अठ्ठावन्नावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## रावणाच्या यज्ञाचा विध्वंस

वानरांनी संकल्प मोडला; पण ते महामोहाच्या आवरणामध्ये अडकून पडले : अति दुस्तर संकल्पावरण। जेणें व्यापिलें त्रिभुवन। तें निरसोनि हरिगण[1]। करीत किराण चालिले॥१॥ सद्गुरूचे कृपेपुढें। संकल्प कायसें बापुडें। जेंवी रवीपुढें मेहुढें[2]। तेंवी उडे अभावत्वें॥२॥ निरसून दुस्तर आवरण। करीत रामनामगर्जन। अति बळियाढे[3] वानरगण। देत किराण चालिले॥३॥ केउता[4] आहे तो लंकापती। काळमुखा त्रिजगतीं। चोरोनि आणिली सीता सती। तेणेंचि शांती झाली त्याची॥४॥ भस्म झालिया आवरणें। आतां काय करावें रावणें। जीव घेवोन पळोन जाणें। अन्यथा जिणें दिसेना॥५॥ वृक्ष झेलिती वानर। एक पर्वतशिखर। करीत रामनामाचा गजर। वीर वानर चालिले॥६॥ तंव पुढें अति दारुण। महामोहाचें आवरण। त्यांत पडिले वानरगण। मोहनिमग्न होवोनि ठेले॥७॥ पडली गडधूप अंधारी। न देखती परस्परीं। वृत्ति झाली पैं घाबिरी। अपांपरी वानरां॥८॥ न दिसे स्वसैन्य परसैन्य। मोडलें सन्मार्गदर्शन। भ्रांत होवोनि ठेले मौन। गमनागमन स्मरेना॥९॥ निजदेहो नाठवे सर्वथा। तेथें कोण जाणे सन्मार्गता। आचरावया कर्माची सामर्थ्यता। स्वधर्मता तेथें कैंची॥१०॥ बुद्धि होवोनि ठेली अंध। चित्त झालें पैं स्तब्ध। निजाभिमानें पडलें गडद। कर्मानुवाद नाठवे॥११॥ आम्ही एक रामभक्त। आज्ञा घेवोनियां येथ। आलों मिळोनियां समस्त। तो कार्यार्थ विसरलो॥१२॥ होम विध्वंसोनि तत्वतां। बाहेर काढोन लंकानाथा। भेटवावें रघुनाथा। हेंही सर्वथा विसरलों॥१३॥ आळसें व्यापिलें शरीरा। देती जांभया करकरां। चांचरी[5] जाताती सैरा। मोहें वानरां व्यापिलें॥१४॥ विसरले कारण। विसरले धर्माचरण। विसरले रघुनंदन। वानरगण आपणा विसरले॥१५॥ उभे उभ्या खाती झोंके। उभेचि घोरती एकें। निद्रा व्यापिली सकळिकें। वानरें असंख्यें पाडिलीं॥१६॥ मोहाचें बळ बहुवस। निजों न दे सावकाश। पडिल्याचि स्वप्नविलास। असम[6] साहस देखती॥१७॥ द्रव्यदाराममता फार। माझी स्त्री माझे पुत्र। स्वप्नीं मांडिती घराचार। पुत्रपौत्रविवाह॥१८॥ माझे व्याही माझे भाई। सोयरे धायरे जांवाई। ममता बहु लेंकीचे ठायीं। उचितें पाहीं दाटत॥१९॥ मी स्वगृहीं नांदत। उदीम व्यवसाय करीत। सोयरियांसीं उदासभूत। ते गृहस्थ पैं काय॥२०॥ ऐसी उचितांची सांकडी। स्वप्नीं पडे अरडीदरडी[7]। जागृतीं कैंची उसंत घडी। मोह कडाडीं आदळला॥२१॥ चिंतासागरीं बुडाले। उचिताचे सांकडीं पडिले। सर्वेचि निद्रा व्यापिले। घोरों लागले घरघरां॥२२॥ एक उठोन वोसणती[8]। एक तयांसी दडपिती। तंव तेही मोहें व्यापिजेती। स्वयें बरळती मी माझें॥२३॥

मोहामधून वानरांची हनुमंताकडून सुटका : त्या मोहाचा निवर्तक। वैराग्ययुक्त विवेक। तेणें हनुमान सबळ देख। मोह निःशेष उडविला॥२४॥ विवेकवैराग्यसमेळीं। देतां नामाची आरोळी। महामोहाची झाली होळी। वानर तत्काळीं सोडविले॥२५॥ गुरुकृपावलोकनें देख। वैराग्य झालें सत्वात्मक। विवेक उपजला निष्टंक। तेणें सकळिक सावधान॥२६॥ महामोहाचें मूळ तत्वतां। अहंता आणि ममता। तिच्या करावया घाता। सविवेकता वैराग्य॥२७॥ गुरुसंप्रदायें जाण। स्वस्थ बैसले हरिगण। स्वस्थ करोनि अंतःकरण।

---

शब्दार्थ : १. वानरसमूह, २. क्षुद्र मेघ, ३. बळवान्, ४. कोठे, ५. झोके, ६. अनुपम, ७. सर्वत्र ठिकाणी, ८. बडबडती.

निजविवंचन स्वयें करिती ॥२८॥ गुर्वाज्ञा पूर्ण ऐसी। जे देहातीत आपणासी। देखोनियां यथार्थेसीं। निजस्वहितासी विनटावें। ॥२९॥ तें विसरोनि गुरुवचन। वृथा पडिले असावधान। पुढें ओढवल्या पतन। सोडवी कोण आम्हासी ॥३०॥ जो गुरूवचनासी विसरे। कामातुरें अति भरे। कां आळसे कांही न स्मरे। निद्राभरें अति भ्रांत ॥३१॥ गुरूसी न स्मरोनि जाण। विषयी लुब्धजा पूर्ण। तो तंव नागवला जाण। नाहीं स्मरण गुरूचें ॥३२॥ कामातुरा नरक दारुण। निद्रिता उभय लोक शून्य। आळसी तो वृथा जाण। करी पोषण देहाचें ॥३३॥

आहारनिद्राभयमैथुनं च समानमेतत्पशुभिर्नराणाम् ।
ज्ञानं नराणामधिको विशेषो ज्ञानेन हीना: पशुभि: समाना: ॥१॥

नेणें कर्माची वेळ। न म्हणे सकाळ सांजकाळ। निद्रा घोरले प्रबळ। अळूमाळ स्मरेना ॥३४॥ आहार निद्रा भय मैथुन। पशुंच्या ठायीं समसमान। तैसेचि देही पशु जाण। पुच्छेंवीण दाढीचें ॥३५॥ पशु भेडवितां परता पळे। विषयी नरकभयें न कंटाळे। घोर नरक अंगी आदळे। तरी खवळे अधिकचि ॥३६॥ भोगिलिया विषयापाठी। पशुसी अल्पही ममता नुठी। विषयिजनांची नवलगोष्टी। घाली मिठी अधिकाधिक ॥३७॥ सकृद्विषयभोगेंकरून[१]। पशु न पाहे परतोन। विषयिजनांचे नवल कोण। सगर्व जाण सोडीना ॥३८॥ पशु विषय भोगूं जाये। मागुता परतोनि न पाहे। विषयिजनांचें अपूर्व आहे। नवल काय सांगूं मी ॥३९॥ प्रीतीं जंव जंव भोग घडे। तंव तंव ममता अधिक वाढे। मोथडबुथडभरी[२] चुडे। अलंकारकोडें घडवित ॥४०॥ विषयीं संतति झाली। तरी अधिकेंचि गुंती पडली। ममता अधिक खवळली। सुदृढ जडली जन्मवेढी ॥४१॥ चित्ता सांकडी पडे। तेणे अधिकाधिक डांव चढे। ऋणा माजी सफाई बुडे। नरक पुढें अनिवार ॥४२॥ एका विषयाची ऐसी गती। अहंममता नागविती। आळसी निद्रिस्थाची स्थिती। तेही संकळितीं सांगेन ॥४३॥

आयुष: क्षण एकोपि न लभ्यो हेमकोटिभि:। स चेद्विफलतां याति का हानिस्तु ततोधिका ॥२॥

नरदेहाची बहुमोलता : कोटि वेंचितां सुवर्ण। नरदेहींचें आयुष्य जाण। न मिळे न मिळे अर्धक्षण। नाना साधनें करितांही ॥४४॥ शिणतां नाना साधनीं। सहसा नरदेह या जनीं। न मिळें पै त्रिभुवनीं। त्याची हानी होतसे ॥४५॥ स्वेच्छा वेंचे विषयसेवनीं। उसंत[३] नाहीं क्षणोक्षणीं। विपायें उरे शेष म्हणोनी। तें ने हिरोनी सुषुप्ती ॥४६॥ नेणे कर्माची वेळ। न म्हणे सकाळ संध्याकाळ। निद्रा घोरले प्रबळ। कांही अळुमाळ स्मरेना ॥४७॥ नाठवी गेल्या आयुष्या। नाठवी स्वधर्म सहसा। फुंपत पडे सर्प जैसा। नाठवे सहसा हृदयस्थ[४] ॥४८॥ विपायें[५] चुकल्या सुषुप्ती। तरी आनाडी[६] भरे वृत्ती। स्वेच्छा सारिपाट खेळती। नातरी मांडिती बुद्धिबळें ॥४९॥ स्वर्गींचे चिंतिती सुरवर। कर्मभूमी नरशरीर। पावतां चुके येरझार। ऐसा थोर नरदेहो ॥५०॥ ऐसी नरदेहाची योग्यता। दुर्लभ ब्रह्मादिकां समस्तां। तें देह पाहोनि तत्वतां। विषयी सर्वथा नाडेले ॥५१॥ आम्ही श्रीरामाचे गण। सद्गुरु हनुमंताचे कृपेंकरून। पावलों आतां रघुनंदन। ते मोहनिमग्न केंवी झालों ॥५२॥ अतर्क्य भगवंताची माया। विश्व संपूर्ण भुलविलें तया[७]। बाप[८] रावणाची कपटचर्या। सेना वानरांचिया मोहित ॥५३॥ तथापि भगवंताचें वरद। हरिभक्तां न बाधी द्वंद्व। निरसोनि मायेचा बाध। स्वरूप शुद्ध भोगिती ॥५४॥

मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥३॥

माझ्या निजभक्तांकडे। न पडे मायेचें सांकडें। मी आपुल्यातें आपुल्याकडे। नेईं निवाडें निजपदा ॥५५॥ सूर्यासीं उगवतां तम। अल्पहि न पडे दुर्गम। तेंवी अभक्तां माया दुर्गम। अति

शब्दार्थ : १. एकवार विषयसुख भोगल्यावर, २. नखशिखांत, ३. फुरसत, ४. ईश्वर, ५. कदाचित्, ६. आडमार्गी.
७. तिने, ८. अत्यंत मोठी.

सुगम हरिभक्तां ॥५६॥ सुगम म्हणतां साच दिसे। परि सत्यत्वें निःशेष नसे। निजभ्रमें तेथें आभासे। निद्रावशें स्वप्न जेंवी ॥५७॥ सूर्यकिरण न पडे दृष्टीं। तैं मृगजळाचा पूर दाटी। स्वस्वरूपीं विन्मुख होतां शेवटीं। भरत दाटी तमाची ॥५८॥ तेंवी रावणाचे कपटतमें जाण। क्षण एक मोहिले हरिगण। पडतां विवेकरविकिरण। उडालें पूर्ण अभावतम ॥५९॥ उदया येतां बोधार्क। अज्ञानतम निःशेख । उडोनि गेलें एकएक। ज्ञानउखा[1] देख उजळली ॥६०॥

रामभक्ती आणि तिचे नाममाहात्म्य: बोधार्काच्या किरणें देख। भ्रम उडाला निःशेख। सावध झाले सविवेक। अपूर्व आणीक पुढें झालें ॥६१॥ विज्ञानमय कोश जाण। केवळ तमाचें आवरण। भेदितांचि हरिगण। पुढीलहि जाण भेदिलें ॥६२॥ नामबळें असमसाहस। करितां विवेक सावकाश। झाला तमाचाही ऱ्हास। स्वप्रकाश त्रिजगतीं ॥६३॥ विवेकाच्या निजनेटीं। निजकारणेंसीं त्रिपुटीं। उडोनि गेला उठाउठीं। जेंवी रविदृष्टीं मृगजळ ॥६४॥ द्रष्टा दृश्य दर्शन। ज्ञाता ज्ञेय निजज्ञान। कर्ता कार्य आणि कारण। यांचे भान उडालें ॥६५॥ भोग्य भोग भोक्ता। वाच्य वचन वदता। ध्येय ध्यान आणि ध्याता। अभावो सर्वथा त्रिपुटीचा ॥६६॥ बोधार्काचा उदय जाण। स्वप्रकाशी त्रिभुवन। सबाह्य झालें आनंदघन। वानरगण सुखरूप ॥६७॥ आनंदमय झाली वृत्ती। विसरले ते बाह्यस्फूर्ती। निघाले होते रावणघातीं। तेही स्थिती विसरले ॥६८॥ विसरले कार्यकारण। विसरले वैरी रावण। विसरले रघुनंदन। वानरपण विसरले ॥६९॥ निजकार्यालागीं जाण। रावण अति विचक्षण। रचिलें आनंदावरण। होम निर्विघ्न साधावया ॥७०॥ परी तें नव्हे अखंड। भेद्रें केलें खंडविखंड । विषयाकारणें उदंड । अति प्रचंड विस्तार ॥७१॥ जे जे रसीं जो जो भरे। तेथोनि मागें न सरे। रावणें मोहिलीं वानरें। सुखोद्गारें डुल्लती ॥७२॥ सकळ रसाचें निजसार। ब्रह्मरस परिकर। विवेक पावले वानर। गुरुकृपासारनिजबळें ॥७३॥ त्याहिमार्जी अतर्क्य जाण। बैसला असे अहंरावण। तेणें साधोनि विंदान। करी हवन अति यत्नें ॥७४॥ त्यासी देखतांचि दृष्टीं। सारसावल्या वानरकोटी। निरसितां आवरणकोटी। रावण दृष्टीं देखिला ॥७५॥ जेंवी गुळामाजी दगड। दिसे गुळाचिसारिखा गोड। तोंडी घालितां अवघड। करीत उपाड[2] दातांचा ॥७६॥ अथवा आंब्याच्या पोटीं। असती रसाची कोटी। त्याहिमार्जी अति संकटीं।असे गांठी अति निवर ॥७७॥ तेंवी कर्म रावणाचें। बाह्यावरण आनंदाचें। अंतरीं भाव कपटाचे। घोर त्याचें आवरण ॥७८॥ अहंमुखी आनंदघन। ऐसें जेथें स्फुरे स्फुरण। तें जाणावें अभिमानजन्य। तेणें हरिगण मोहिजेती ॥७९॥ तंव ते निजनिष्ठा सावध। छेदोनी अहंसोहं यांचे बांध। पावले ते अगाध बोध। अहंरावणकंद छेदावया ॥८०॥ दृष्टी देखताचि रावण। सरसावले वानरगण। घृतीं खवळे हुताशन। तेंवी वारनगण खवळले ॥८१॥ माथां वाहोनि पुच्छाटी। प्रवेशले यज्ञवाटीं। रावण देखोनियां दृष्टीं। दोनी मुष्टी वळियेल्या ॥८२॥

तथान्ये चोदकं हव्यं दर्भान्पात्राणि चापरे। बलिंच निर्विकीर्याणाः खमुत्पत्य प्लवंगमाः ॥४॥

खवळलें वानरकटक। कुंड विझविती एक। प्रणीतापात्रीं[3] भरिलें उदक। तें कुंडीं निःशेष रिचविलें[4] ॥८३॥ इध्माबर्हि[5] परिस्तरण[6]। तें विखुरती वानरगण । होमद्रव्यें भरिलें भाण[7]। घेवोनि गगनीं उपरमती[8] ॥८४॥ रावण निजकार्यार्थी। सावधान अहोरातीं। आवरोनी बाह्यवृत्ती। श्रीरामघातीं मंत्र जपे ॥८५॥ वधावया रामसौमित्र। मंत्र जपतां अव्यग्र। मंत्रदेवता भयातुर। स्वयें विचार करीतसे ॥८६॥ मंत्राधीन माझी शक्ती। जायकाची[9] कार्यस्थिती। साधावया शीघ्र गती। जप करिती सावध ॥८७॥ भाग्यानुसार जाण। मंत्रदेवता प्रसन्न। रावणाचें विचित्र

शब्दार्थ : १. ज्ञानरूप पहांट, उषःकाल, २. पाडणे, ३. यज्ञपात्रविशेष, ४. ओतिले, ५. समिधा व दर्भ, ६. कुंडाच्या भोवतीली पसरलेला दर्भ, ७. भांडे, ८. आनंदती, ९. जपणाराची.

चिन्ह। श्रीरघुनंदनवधार्थ ॥८८॥ श्रीरामें जगाची उत्पत्ती। श्रीरामें जगाची स्थितिगती। जगाची निजविश्रांती। जाण निश्चितीं श्रीरामें ॥८९॥ मंत्रदेवता समस्ता। रामसामर्थ्ये सामर्थ्यवंता। कैसेनि होय त्याच्या घाता। मूर्ख तत्वता रावण ॥९०॥ राम जगाचें जीवन। त्याचें करितां हनन। भाग्य विमुख झालें जाण। स्वयें रावण मरेल ॥९१॥ आणिकाची असो गती। राम आमची जीवनस्थिती। केंवी प्रवर्तों त्याचे घातीं। लंकापति भ्रमलासे ॥९२॥ निजमूळातें छेदून। वृक्ष केंवी राहे आपण। तुटल्या तळ्याचें जीवन। वांचे मीन हें न घडे ॥९३॥ श्रीराम जगाचा पिता। त्या पवर्तला पितृघाता। यासीं द्यावया प्रायश्चित्ता। याच्या घाता प्रवर्तावें ॥९४॥

रावणाची शोचनीय अवस्था : पितृघातका प्रायश्चित्त। वेद बोलला देहांत। तोचि साधावया कार्यार्थ। करूं घात रावणाचा ॥९५॥ म्हणोनि खुंटली वचनावळी। नुच्चारे मंत्रशैली। स्वयेंचि बैसली दांतखिळी। दुःखें तळमळी रावण ॥९६॥ प्राप्तकाळ आला समीप। तंव विझोनि गेला वाग्दीप। वर्ण उच्चारेना स्वल्प। कोण पाप ओढवलें ॥९७॥ शंकरें होवोनि प्रसन्न। मज दिधलें वरदान। शेंखीं उच्चारिना वर्ण। दारुण विघ्न ओढवलें ॥९८॥

वानरांच्या आक्रमणाने यज्ञात विघ्न : होमपात्रें फोडिलीं समस्त। त्रिसधानें[1] तोडिलीं तेथ। स्रुवां[2] हातींचा आंसुडत। नामें गर्जत वानर ॥९९॥ पंचकोश पंचावरण। भेदोनियां अति दारुण। अंगीं आदळलें[3] हरिगण। तरी रावण ढळेनां[4] ॥१००॥ अंतरीं निग्रहिलीं[5] वृत्ती। येवों नेदी ब्राह्मस्थिती। वानर इतस्ततां ओढिती। तरी स्थिति ढळेना ॥१॥ अंगीं आदळतां वानरांसी। रावण विचारी मानसीं। विघ्न उठिलें होमासीं। सर्वथा त्यासी मी न मानीं ॥२॥ आटक दुर्ग त्रिकूटाचे। उग्रावरण पंचकोशांचें। भोंवतें राखण महावीरांचें। भय तयांचें यमकाळा ॥३॥ त्याहिमाजी अतर्क्य स्थिती। शस्त्रें गुप्त नभोगती। सर्वथा कोणी न लक्षती। पारख्या[6] निवटिती क्षणमात्रें ॥४॥ येथें यावया वानरगण। सर्वथा नाहीं आंगवण। निमेषमात्रें सांडिती प्राण। अर्ध क्षण न लागतां ॥५॥ दिसतांही वानरकोटी। विघ्न उठलें यज्ञवाटीं। यासीं सर्वथा मी नाणीं दृष्टी। म्हणोनि निमटी निजनयन ॥६॥ गर्वाचा ताठा अंतरीं। तेणें नेत्रासीं अंधारी। नेण हरिगणाची थोरी। केली बोहरी निजगर्वे ॥७॥

सालस्यो गर्वितो निद्रः परहस्तेन लेखकः। अल्पविद्यो विवादी च पडेते चात्मघातकाः ॥५॥

कष्टीं तपश्चर्या करितां। प्राप्तकाळ समीप येतां। आळस उपजला चित्ता। तरी निजघाता स्वयें केलें ॥८॥ गर्वाचा ताठा चढला। तेणें विवेक बुडविला। त्रिमदें अति मातला। घात केला स्वयेंचि ॥९॥ धनमद पानपाद। अति मान्यतेचा राजमद। तेणें प्राणी होय अंध। कार्यानुवाद नाठवे ॥११०॥ निद्रातुराच्या ठायीं। कार्य स्मरेना पाहीं। सकळ सांजवेळ नेणे काहीं। नाडला पाहीं निजहिता ॥११॥ उपजली मंत्राची आर्ती। लेहूं जातां आणिका हातीं। व्यंग लिहिल्या वर्ण व्यक्ती। विघ्नप्राप्ती होय सद्य ॥१२॥ विद्येचें न साधतां ज्ञान। करूं जातां आराधन। मंत्रदेवता क्षोभून। सद्य विघ्न पैं करिती ॥१३॥ ज्ञान नाहीं निश्चयात्मक। वाद करूं बैसती एक। निजघात तेणेंचि देख। विचार आणिक असेना ॥१४॥ तैसा निजगर्वे भुलला। हरिगणातें न गणी वहिला। निजगर्वे नागविला। होमाचा केला निःपात ॥१५॥ इतस्ततां वानर। ओढिताती सैर। नेत्र उघडी दशशिर। म्हणे थोर विघ्न उठलें ॥१६॥

तरीही रावण अगदी निश्चळ : होमकुंडाची झाली शांती। पात्रें नेलीं भस्मांतीं। यज्ञोपचार विध्वंसिती। परी लंकापति डंडळीना ॥१७॥ घोरकर्मी रावण। सर्वथा डंडळीना मन। सुखावला तारानंदन। निधडी आंगवण लंकेशा ॥१८॥ युद्धीं श्रीरामासंमुख। केवीं जाय दशमुख। म्हणोनियां युवराजा देख। मंत्र अलोलिक योजिला ॥१९॥

शब्दार्थ : १. त्रिसंधान = दर्भाची दोरी, २. यज्ञांतील पळीसारखे पात्र, ३. भिडले, ४. हालेना, ५. निरोधिली, ६. परक्याला.

मंदोदरीला पीडा देण्याची अंगदाची युक्ती : जवळी देखिली मंदोदरी। तीस पीडितां झडकरी। ध्यान सांडोनि दशशिरीं। महामारीं उठेल॥१२०॥ काढोनि नेऊं रामापासीं। राम निवटील रावणासी। कार्य साधेल अनायासीं। म्हणोनि केशीं धरियेली॥२१॥

दृष्ट्वाथ रावणं सर्वमिदमाहांगदो वचः। इमां मंदोदरीं पार्श्वे नयामि तव पश्यतः॥६॥
या ते शक्तिर्बलं वीर्यं तेन तिष्ठ त्वमग्रतः। कृत्वा शिरसि पादं ते नयाम्येनां स्त्रियं तव॥७॥

वानर करतां आकर्षण। डंडळीना तो रावण। तेणें अंगद क्षोभून। केलें विंदान तें ऐका॥२२॥ हाका मारोनि वेगेंसीं। बोलता झाला रावणासी। मंदोदरी धरानि केशीं। श्रीरामापासीं पैं नेतों॥२३॥ रावणा ऐकें तत्वतां। तुज देखतां तुझी कांता[1]। धरोनि नेईन मी आतां। करीं साटोपता युद्धासी॥२४॥ श्यामवदन लंकापती। लांछन लागलें तुझे शक्ती। चोरोनि आणिली सीता सती। वीरवृत्ती न करवेचि॥२५॥ तैसें मी करीं जाणां। तुज देखतां तुझी अंगना। नेईन करीत विटंबना। श्रीरघुनंदनासमीप॥२६॥ मी रामाचा दूत। निंद्य कर्म न करीं निश्चित। तुझ्या माथां देवोनि लाथ। नेईन ओढित पैं आतां॥२७॥ सामर्थ्य असेल शरीरीं। तरी सोडीवीं मंदोदरी। नाककानां करोनि बोहरी। नेतों अंतुरी मी तुझी॥२८॥ म्हणोनि केलें खस्ताव्यस्त[2]। झोंटीं[3] धरोनि ओढित। तेणें ते झाली दुःखित। आक्रंदत अति थोर॥२९॥

ततो मंदोदरी दीना रावणं वाक्यमब्रवीत्। किं न पश्यसि मां राजन्ननाथां त्वयि जीवति॥८॥

मंदोदरीच्या आक्रोशाने रावणाचा संताप : वानर करितां खस्ताव्यस्त। मंदोदरी आक्रंदत। रावणाप्रति सांगत। कासया भ्रांत झालासी॥१३०॥ जेंवी जळामाजील लता[4]। गज रिघोनि मर्दी समस्ता। वानरें तेंवी करितां खस्ता। प्राण तत्वतां जाईल माझा॥३१॥ जळो तुझी शौर्यशक्ती। जळो तुझी निजकीर्ती। जळो तुझी यज्ञस्थिती। झांकिसी किती निजनयनां॥३२॥ वानरीं घेतलें घर। दुर्गी विचरती अति सैर। विध्वंसिले यज्ञोपचार। पात्रें समग्र फोडिलीं॥३३॥ तुज करितां खस्ताव्यस्त। सावध नव्हे तुझें चित्त। रामविरोधें केलें भ्रांत। कांही स्वहित स्फुरेना॥३४॥ चोरोनियां सीता सती। व्यर्थ द्वेषिला रघुपती। जीवित्वाची खुंटली गती। केली शांती निजकर्मे॥३५॥ पुत्र प्रधान मारविले। सैन्य सेनानी जीवें गेले। वंधूंसीं विटंबन केलें। जीवें घेतलें कुंभकर्णा॥३६॥ दुर्धर बाणींकरून। तुज निवटितां रघुनंदन। न लगे रे अर्ध क्षण। आतां हवन तें काय॥३७॥ असो तुम्ही मरणगोष्टी। मज वानरीं घातली मिठी। कोणाप्रति सांगों गोष्टी। कोण संकटीं सोडवील॥३८॥ तूं जीत असतां शिरावरी। मज दीन केलें वानरीं। ओढिती धरोनि केशाग्रीं। पीडा भारी करिताती॥३९॥ शिरावरी असतां कांत। ज्याची अंगना अनाथ। जळो त्या पतीचें जीवित। अति निंदित लौकिकीं॥१४०॥ जीत असतां इंद्रजित। रणकंदन करिता येथ। दावोन निजपुरुषार्थ। मज त्वरित सोडविता॥४१॥ जीवें निमाला रावण। म्हणोनि मजलागी जाण। पीडिताती वानरगण। अति गर्जोन आक्रंदे॥४२॥ जरी असतां जीवें जीत। तरी करोनि पुरुषार्थ। मज सोडविता येथ। रावण निश्चित निमाला॥४३॥ म्हणोनि आक्रंदे गोरटी। वानरीं बांधिली शकुनगांठी। पतिव्रतेच्या वाक्पुटीं[5]। निघाली गोष्टी ते सत्य॥४४॥ म्हणानि देती आरोळी। गर्जती नामाच्या कल्लोळीं। तेणें रावणाची दांतखिळी। उखळली तत्काळ॥४५॥

स्त्रीमोहाचे दुष्परिणाम : स्त्रियांचे मोहक बोली। कोण कोणा न पडे भुली। सिद्ध मिळविले धुळी। विकल्पबोलीं स्त्रियेच्या॥४६॥ भस्मासुरासी मोहिनी। भेटोनियां तत्क्षणीं। क्षणें

शब्दार्थ : १. स्त्री, २. ओढाताण, ३. केसांचे ठिकाणी, ४. वेल, ५. तोंडातून.

मारिला मोहोनी। न मागतां पाणी निमाला ॥४७॥ श्रीशुकाची अगाध स्थिती। वचनमात्रें निश्चितीं। क्षणें नेलीं भस्मांतीं । निमेषगती न लागतां ॥४८॥ तेथें रावण बापुडें तें किती। क्षणें आणिलें बाह्यवृत्ती। मोकळी झाली वचनोक्ती। तेही स्थिती अवधारा ॥४९॥ रामनामाच्या कल्लोळीं। मंत्रदेवता मुक्त झाली। तिणें झोडिली वचनावळी। बोलावया बोली पैस[1] झाला ॥१५०॥ मग उठिला सत्वर। दांत खातसे करकर। नेत्र दिसती रक्तांबर। अति भ्यासुर भासती ॥५१॥ क्रोधें बोलें अंगदासी। स्त्रियेसी धरोनियां केशीं। व्यर्थ कारे ओढितोसी। अधम होसी वीरांत ॥५२॥ जेणें स्त्रियेसी दंडणें। त्यासी वीर कोण म्हणे। धिक् धिक् त्याचें जिणें । वृथा पीडणें स्त्रियेसी ॥५३॥

अंगदाचें प्रत्युत्तर : ऐकोनि त्याचिये गोष्टीसी। अंगद निर्भर्त्सी तयासी। मुख दाखवितां न लाजसी। उंच बोलसी नाकाडें[2] ॥५४॥ भिकेचेनि मिषें तत्वतां। चोरोनि नेतां पैं सीता। मार्गी घोळसिलासि पैं येतां। लाज सर्वथा तुज नाहीं ॥५५॥ माता म्हणसी जियेसी। तिसी भोगूं पहासी। पापें मेळविलें धुळीसी। पुत्रसैन्यासी मारविलें ॥५६॥ ऐशा अंगदाच्या उत्तरीं। रावण पोळला अंतरीं। धरिली देखतां मंदोदरी। क्रोध शरीरीं चढिन्निला ॥५७॥

तच्छ्रुत्वा रावणः कुद्धो दृष्ट्वा रुद्धां प्रियां तदा। अंगदं मुष्टिना जघ्ने मूर्ध्नि सद्यः पपात ह ॥१॥

मुष्टी वळोनि आवेशीं। धांव घेवोनि वेगेंसीं। माथां हाणितां अंगदासीं। मूर्च्छा तयासीं पैं आली ॥५८॥ तें देखोनि मारुती। अंतरिक्षनभोगती। तो येवोनियां लंकापती। भुजांतराप्रती ठोकिला ॥५९॥

रावणाच्या यज्ञाचा विध्वंस व रावणाला मूर्च्छा: तेणें गेला चांचरी[3]। डोळियां आली अंधारी। आंग जातसे भंबेरी[4]। रावण धरेवरी पडों पाहे ॥१६०॥ मूर्च्छा भांजोनि[5] अंगद। तत्काळ झाला सावध। हृदयीं दाटला आनंद। कार्य सिद्ध पैं झालें ॥६१॥ विध्वंसिलें यागासी। उठविलें रावणासी। आतां नेल्या रामापासीं। क्षणार्धेसीं निवटील ॥६२॥ श्रीरामनामें गर्जत। अति बळियाढे रामभक्त। रावण केला सावचित्त। याग समस्त नासोनी ॥६३॥ एका जनार्दना शरण। विध्वंसिला रावणयज्ञ। करोनि मंदोदरीशांतवन। युद्धा रावण निघाला ॥६४॥ रसाळ कथानिरूपण। अति रम्य रामायण। एका विनवी जनार्दन। श्रोतीं अवधान मज द्यावें ॥१६५॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावण यज्ञविध्वंसनं नाम अष्टपंचाशत्तमोऽध्यायः ॥५८॥ ओंव्या ॥१६५॥ श्लोक ॥९॥ एवं ॥१७४॥

## अध्याय एकूणसाठावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### रावणाचे युद्धार्थ आगमन

रावण सावध होऊन मंदोदरीला धीर देतो, सांत्वन करितो: निजमूर्च्छा सांवरून। सावध झाला रावण। तंव पुढें विझालें हवन। रावणें आपण देखिलें ॥१॥ सकळ यज्ञसामग्री। वानरीं केली बोहरी। तें देखोनि दशशिरीं। क्रोध शरीरीं चढिन्निला ॥२॥ मंदोदरी स्वयें रडत। देखोनियां लंकानाथ। स्वयें तीस शांतवीत । निजपुरुषार्थ बोलोन ॥३॥

साभिमानैर्वचोभिस्तां सांत्वयन्निदमब्रवीत्। किं रोदिषि शुभे दीनं मयि जीवति मानिनि ॥१॥
न मे किञ्चित्समो युद्धे त्रिषु लोकेषु भामिनि। सेंद्राः सुरगणाः सर्वे तिष्ठंति हि वशे मम ॥२॥
किमल्पसारैः शक्योऽहं जेतुं वानरमानुषैः ॥३॥

---

शब्दार्थ : १. अवकाश, २. नाक वर करून, ३. भोंवळ आली, ४. उपहासाला, ५. सांडून.

निजाभिमानें दशानन। मंदोदरीप्रति वचन। करोनि तिचें शांतवन। स्वयें आपण बोलत॥४॥ सुमंगले मंदोदरी। व्यर्थ रुदनातें न करीं। तुज खस्ता केली वानरीं। त्यांची बोहरी करीन मी॥५॥ शुभानने परियेसीं। संग्रामीं संमुख मजसीं। रणा न येववे कोणासी। दैत्यदानवांसी कोण गणी॥६॥ इंद्रादि सुर समस्त। बंदीगृहीं सेवा करित। ब्रह्मा माझा नित्यांकित। नित्य पढत शांतिपाठ॥७॥ तेथें अल्पशक्ति किंकर। मानव आणि वनचर। रणा येती मजसमोर। हें उत्तर घडेना॥८॥ तुजदेखतां भामिनी। वानरमानवांच्या श्रेणी। क्षणें पाडीन मी रणीं। न्हाणीन धरणी अशुद्धें॥९॥ माझे क्रोधदृष्टीपुढें। केंवी राहती माकडें।आतां रणीं पाडीन लोंढे। निजनिवाडें पाहें तूं॥१०॥ वानरमानवांच्या भूतळीं। शिरांची खेळेन चेंडूफळी। अशुद्धाचा[१] टिळा तत्काळीं। लावीन निढळीं पैं तुझ्या॥११॥ जिहीं हातीं निश्चित। तुज केलें खस्ताव्यस्त। ते उपडीन समस्त। तुज देखत भामिनी॥१२॥ हातांपायांची कांडोरीं[२]। शिरांच्या वढवाळी[३] थोरी। तुजदेखतां करीन जरी। तरीच निर्धारीं मी रावण॥१३॥ निवटोनियां वानरगण। रामसौमित्रांच्या रुधिरें जाण। तुझ्या दुःखाचें क्षाळण[४]। करीन आपण सुंदरी॥१४॥

इति तां शोकसंतप्तां सांत्वयित्वा तु रावणः। रथमारुह्य वेगेन निर्जगाम रणं प्रति॥४॥

स क्रुद्धः कवची खड्गी शरी धन्वी तथैव च। तस्य निष्क्रममाणस्य दग्धुकामस्य रोदसी॥५॥

रावणाने केलेली घोर प्रतिज्ञा: आजि पृथ्वी अरावण। कीं अराम देखसी जण। म्हणोनि गर्जतां आपण। करी सांत्वन मंदोदरीचें॥१५॥ ऐसी दुःखसंतप्त मंदोदरी। तिसीं रावणें बहुतांपरी। शांतवोनि अति कुसरीं। गिरागजरीं गर्जिन्नला॥१६॥ आजि श्रीरामातें रणीं। बाणेंकरीं भंगाणी। झणें भय धराल कोणी। पहा करणी करीन ते॥१७॥

रावणाकडून सैन्य सिद्ध करण्याची आज्ञा: कुचा भवंडिला सैन्यासीं। सिद्ध व्हावें वेगेंसीं। उठा चला रणभूमीसीं। रामसौमित्रासी वधावया॥१८॥ घावो घातला निशाणा। वेगें पालाणा[५] पालाणा। आवेश आलासे रावणा। रणांगणा जावया॥१९॥ दीपा अस्त होतां पाहें। प्रकाश अधिकाधिक होये। तैसें रावणा झालें आहे। गर्जताहे अति गर्वे॥२०॥ पुष्पाचें जें विकासणें। तेंचि त्याचें सुकणें। तेंवी रावणाचें गर्जणें। जीवें मरणें तत्काळ॥२१॥ विजु प्रकाशातें पावणें। तोचि तिसीं अस्त होणें। तैसें मांडिले रावणें। निजमरणें गर्जत॥२२॥ काठीकार[६] सैरां धांवती। सैन्य सन्नद्धबद्ध करिती। रणा निघाला लंकापती। शीघ्रगती चालिला॥२३॥ म्हणोनियां त्वरित। सोटेमार करी दूत। तेणें नगरीं अति आकांत। कळकळित नरनारी॥२४॥ नगरीं होत रणवळसा[७]। प्रिया झोंबती प्राणेशा। मागुती देखावया ऐसा। धीर सहसा उपजेना॥२५॥

प्रजाजनांचे आक्रंदन : आम्ही काय करूं आतां। आम्हांसी कोण निरूपिता। मरण आलें लंकानाथा। सांगाती तत्वतां करीतसे॥२६॥ आतां आम्हीं करणें कायी। तुम्हांसी पाहों कोणे ठायीं। म्हणोनि कंठीं झोंबती पाहीं। लोळणी तिही घातली॥२७॥ कांतेप्रति कांत सांगत। देह पोशिला दिवस बहुत। रावणाचे वेतन खात। त्यासीं रणांत सोडूं नये॥२८॥ जळो तयाचें वेतन। पोट भरूं भिक्षा करून। रणा नवजावें आपण। म्हणोनि चरण वंदिती॥२९॥ तंव दूत हाणिती पाठीवरी। ओढून काढिती बाहेरी। शंखस्फुरण घरोघरीं। नरनारीं कळकळिती॥३०॥

वानरसैन्याला आनंद व त्यांचा युद्धाचा आवेश: काळें तोंड लंकानाथा। चोरून आणिली सती सीता। आतां मरावया जातां। सवें समस्तां नेतसे॥३१॥ तें ऐकूनि हरिगण। देती रामनामें

शब्दार्थ : १. रक्ताचा, २. तुकडे, ३. राशी, ४. परिमार्जन, ५. सिद्ध व्हा, ६. दूत, ७. रणकल्लोळ.

किराण[1]। श्रीरामासंमुख दशानन। युद्धालागून निघाला॥३२॥ आतां कायसी खटपट। कासया पडखळूं[2] दशकंठ। म्हणोनि हरिखले मर्कट। देती उद्भट किराण॥३३॥

**रावणसैन्याची सिद्धता :** तंव रावणदळ समस्त। सन्नद्धबद्ध झालें तेथ। वाद्यें लागलीं अद्भुत। नादें गर्जत भूगोळ॥३४॥ तुरें लागलीं विविध। अनुहताचा[3] निजनाद। ध्वनि उठल्या बहुविध। भाग्य विविध रावणाचें॥३५॥ भेरी मृदंग निशाण। गुजबुजी गिडिबिडी जाण। काहळा चिनकाहळा दारुण। भोंगळा सत्राण[4] त्राहाटिल्या॥३६॥ वीणा वेणु झल्लरी। नाद उठिला अति गजरीं। विराणीं[5] वाजती एकसरीं। नादाभीतरीं मन निवे॥३७॥ रणनोवरा दशशिरी। पर्णावया[6] मोक्षनारी। निघालासे झडकरी। अनुहतगजरी लावोनियां॥३८॥ सन्नद्ध चतुरंगसेना। सवें सकळ युद्धरचना। शस्त्रास्त्रांची विवंचना। खडतर जाणा सांगातें॥३९॥ विचित्र कवचांचे भार। खड्ग तोमर लहुडीचक्र। गदा मुद्गल अपार। सर्वे गाढे भार चालिले॥४०॥ विचित्र शस्त्रांचिया जाती। त्रिशूळ चेंडु झेलिती किती। एव वीर परिघहाती। पागोरे पिटिती भिंडिमाळा॥४१॥ गाडे भरोनि अपार शर। सुवर्णबंदी कोदंडभार। ज्यांचा ऐकतां टणत्कार। कांपे थरथर त्रिलोक॥४२॥ अस्त्रदेवता समस्ती। भेणेंचि सवें चालती। विपायें[7] वांचला लंकापती। करील शांति सकळांची॥४३॥ येणें भयेंकरोनि जाण। संमत्र अस्त्रदेवतागण। स्वयें चालवी दशानन। विचित्र विंदाण सेनेचें॥४४॥ ध्वजा पताका अंबरी। भाले झळकती चवरी। दिव्य छत्रें सैन्यावरी। राक्षसभारीं अति शोभा॥४५॥ महामदें दाटले गजघट। वारूंचा[8] वाजिन्नला साट। रथचक्रातळीं सपाट। होती पीठ पर्वत॥४६॥ पुत्रप्रधानाचें दु:ख। स्त्रियेची खस्ता अलोलिक। आठवोनि दशमुख। क्रोधें देख कांपत॥४७॥ साधावया श्रीरामासी। रथीं बैसतां रावणासीं। रूप वाढिन्नलें आकाशीं। देखतां लोकांसी पळ सुटे॥४८॥ सैन्य चालिलें अति गजरीं। यावा[9] दाविला स्वारीं। हो हो मा मा जीजीकारीं। वारू कुसरीं नाचती॥४९॥ सैन्य चालिलें घनदाट। अश्वगजांचे पैं थाट। सैन्यरथांचे घडघडाट। रजें अंबर कोंदलें॥५०॥

**दुश्चिन्हांचा आविष्कार :** दिवि[10] भुवि अंतराळ। दिशांच्या पोकळ्या सकळ। रजें कोंदलें जगतीतळ। रविमंडळ झांकलें॥५१॥ दिवसाच पडिला अंधार। रजें बुडाले पैं नेत्र। दुर्निमित्तें थोर थोर। तेथें सत्वर ऊठिलीं॥५२॥

निमित्तानि च तत्रासन्भयशंसीनि सर्वत:। प्रतिलोमो ववौ वायुर्मंदरश्मिर्दिवाकर:॥६॥
सागरश्चुक्षुभुश्चैव चकंपे च वसुंधरा। जानुभि: पेतुरश्वाश्च बाप्पबिंदूनथामुचन्॥७॥
तानुत्पातानचिंत्यैव रावण: क्रोधमूर्च्छित:। सशरं धनुरादाय रणभूमिं विवेश ह॥८॥

शिखाकेत अग्निकेत। गगनीं उठिले धूमकेत। तयांमाजी उल्कापात। अकस्मात ऊठिले॥५३॥ नक्षत्रें पडती टळटळां। भूकंप होतसे वेळोवेळां। भालू भुंकती समकाळा। अग्निज्वाळा वमूनियां॥५४॥ हनुमंतें पूर्वी प्रबोधिला। तो आठव धरोनि वहिला[11]। प्रतिकूळ वायु सुटला। उडवूं लागला राक्षसां॥५५॥ वस्त्रें उडती आकाशा। वायु भरला राक्षसघसां। प्राण परतेना सहसा। थोर दुर्दशा रावणा॥५६॥ धुळीं भरले डोळे। स्वसैन्य परसैन्य न कळे। पुढें पाऊलही न उचले। भुलविलें सकळांसी॥५७॥ रवि मंदरश्मि[12] झाला पाहीं। दिशा धुंदल्या सर्वही। सागरींचें जळ तेंही। लवलाही उचंबळलें॥५८॥ ऐंसी दुश्चिन्हें जितुकीं। सकळही रावणकटकीं। प्रवेशलीं एकाएकीं। तेणें दशमुखी सचिंत॥५९॥

**रावण उद्विग्न होतो :** म्हणे शंकराचें वचन। मिथ्या करूं शके कोण। यज्ञा उठिलिया

**शब्दार्थ :** १. उड्या, २. घेरूं, ३. योगधारणेने ऐकू येणारा एक प्रकारचा ध्वनी, ४. जोराने, ५. वाद्यविशेष, ६. विवाह लावण्यास, ७. कदाचित्, ८. घोड्यांचा, ९. आगमन, १०. स्वर्गी, ११. त्वरित, १२ मंदकिरणांचा असा.

विघ्न। घात संपूर्ण कर्त्याचा॥६०॥ तें आजि दिसतें फळ। दुर्निमित्तें जी प्रबळ। येथें दिसताती सकळ। समग्र दळ व्यापिलें॥६१॥ ऐसा झाला सचिंत। दुर्निमित्तें भ्रमीभूत। क्षण एक झाला लंकानाथ। अति आकांत वर्तला॥६२॥

**रावण स्वतःला सावरून सैन्याला धीर देतो :** सवेंचि सावध होवोनि पाहीं। विचारीं आपुल्याच ठायीं। म्हणे दुश्चिन्हीं भय कायी। युद्धाच्या ठायीं शूरासी॥६३॥ सुचिन्हामाजी शंकर। तो दुश्चिन्हीं काय गेला दूर। व्यर्थ पामराचा विचार। मी चिंतातुर लटकाचि॥६४॥ रांडवे बायलेच्यापरी। चिंतातुर मी शरीरीं। जळो माझी सामर्थ्यथोरी। काय संसारी जीतसें[१]॥६५॥ म्हणोनि झाला सावध। निजसैन्या करीत बोध। मिथ्या उठिलें हें द्वंद्व[२]। त्याचा विषाद न मानवा॥६६॥ शिवें पाहो आदरिलें व्रत। युद्धीं लागलिया आघात। रणीं दुश्चित कीं सावचित्त। निश्चितार्थ पहावया॥६७॥ तें शंकरकृपा आम्हांसीं। आपेंआप फळली कैसी। आम्हांसंमुख विघ्नांसी। रहावयासी तोंड कैंचे॥६८॥ बाप कृपाळु शंकर। विघ्न निरसिलें समग्र। भिवो नका चला शीघ्र। नरवानर निवटावया॥६९॥ ऐसें सांगोनि सैन्यासी। आश्वासोनि तयासी। संमुख जातां रणभूमीसीं। रथ तोंडघसीं आदळला॥७०॥

**पुनः विघ्नांचा उत्पात व रावणाचा आवेश:** विषमस्थळ[३] नसतां जाण। भूमि असतां समान। वारू चालतां स्यंदन। अडखळोन पडियेला॥७१॥ आवरितां सारथ्यासी। वारू पडले तोंडघसीं। तेणें चिंता रावणासी। निजमानसीं वर्तली॥७२॥ तथापि वीरवृत्ती करून। साटोप धरोनि रावण। वारू उठविले जाण । उदकसिंचन करोनियां ॥७३॥ अश्वांचिया नेत्रद्वारा। अश्रुबिंदु स्रवती सैरा। ते पुसोनि वेगवत्तरा। रहंवर[४] संजोगिले॥७४॥ वीर रावण जगजेठी। विघ्नें घालोनियां पोटीं। धनुष्यबाण धरोनि मुष्टीं। क्रोधें कडकडाटीं चालिला॥७५॥ आठवोनि पुत्रांचें निधन। धाकुटा बंधु कुंभकर्ण। प्रहस्तादि प्रधान। सकळ सैन्य निमलें॥७६॥ करोनि तयांची आठवणी। क्रोधें झाला काळाग्नी। प्रवेशला रणांगणीं। देवोनि पाणी सर्वस्वा॥७७॥ राज्याशा आणि जीविताशा। सांडूनि भोगाची भोगाशा। सांडून ऐश्वर्याची आशा। विरक्त सर्वस्वा रावण॥७८॥ केवळ क्रोधाचें निजशरीर। तेणें रूपा आला दशशिर। जेंवी मध्यान्हीं अति उग्र। दिसे खडतर भास्वत॥७९॥ माध्यान्हकाळींचा रवी। सहसा होय दुर्निरीक्ष्य जेंवी। तैसा अति क्रोधाविर्भावी। दशग्रीव भासे॥८०॥ अंतरींचें निजसामर्थ्य। तेणें करोनि प्रदीप्त । रणीं गर्जोनि लंकानाथ । काय बोलत रामासी॥८१॥

राम त्वं तु समाश्वस्तः समाश्वस्तस्तथाप्यहम्। कुर्वे त्वया समं युद्धं तिष्ठेदानीं स्थिरो भव॥९॥
वीरक्षास्मि सुसंवृत्तस्त्वत्सकाशादरिंदम। क्रमेण परिनष्टो ह्यस्तेनाहमपयातवान्॥१०॥
नाहं बिभ्ये सुराणां हि समस्तानामपि प्रभो। किं पुनर्वानराणां तु येशामाश्रयिता भवान्॥११॥

**श्रीरामांवर वाग्बाणांचा वर्षाव आणि रावणाची आत्मप्रौढी :** रामा तुझे पोटीं। युद्ध करणें कडकडाटीं। ते आजि साधिली गोष्टी। झणीं[५] पाठी देवोनी पळसी[५]॥८२॥ बहुतां दिवसांची माझी। असोसी[६] फळली आजी। राम सांपडला झुंजी। पुण्यपुंजी फळा आली॥८३॥ सावध ऐकें रघुनंदन। होऊं नको पलायमान। जितकी असे आंगवण। तैसें रण करीन आजि॥८४॥ पूर्वी मजपासून पळाला। तो मागुतेनि रणा आला। आतांही पळवीन वहिला। झणें या बोला भ्रमसील॥८५॥ तरी एक वेळ ऐसें जाहलें। रथसारथि वारू मेले। म्हणोनि पलायन घडलें। तें सर्वथा पहिलें विसरावें॥८६॥ मी न भियें देवांसी। दृष्टी नाणीं दानवांसी। तेथें कोण गुणी तुम्हांसी। जिहीं वानरांसी आश्रयिलें॥८७॥ पालेखाइरीं मर्कटें। रणा आलासी त्यांच्या नेटें। घाव घालतां अवचटें। अति संकटें मराल॥८८॥ वीरवृत्तीचा गर्व बहुत। तुजमाजी असे नांद। तेणें रणवीरां न गणित। तो पुरुषार्थ आजि दावीं॥८९॥

---

शब्दार्थ : १.वांचतो, २. लढणे, ३. उंच खोल, ४. रथ, ५. पळूं नकोस, ६. आतुरता.

लक्ष्मणाने रावणाची केलेली नालस्ती : ऐसें बोलतां दशानन। उत्तर नेदी रघुनंदन। जेंवी वायसाचें[1] वचन । सांडी उपेक्षोन राजहंस॥९०॥ सिंह देखोनि वाडेंकोडें। श्वान भुंके पुढें पुढें। तेंवी श्रीराम रावणाकडे। न पाहे कोडें[2] हांसोनी॥९१॥

काकुत्स्थोपि महातेजा: श्रुत्वा रावणभाषितम्। न किंचिदुक्त्वा धर्मात्मा तस्थौ संग्राममूर्धनि॥१२॥

लक्ष्मण: क्षोभयामास धिक्कृत्य तु दशाननम्। लक्ष्मणस्य वच: श्रुत्वा संपीडितमनास्तदा॥१३॥

रावणाच्या तिखट उत्तरीं। राम न भीच रणकेसरी। जेंवी सिंहापुढें कोल्हाळ करी। निजगजरीं शूकर॥९२॥ तें देखोनि लक्ष्मण। क्रोधें झाला देदीप्यमान। निर्भर्त्सिला रावण। काळें वदन पैं तुझें॥९३॥ निर्लज्जा न लाजसी दशकंठा। हीन दीन संग्रामनष्टा। वृथा वाढलासी मांसें मोठा। धर्मनष्टा दुराचारा॥९४॥ वृथा बोल बोलसी किती। करोनि दावीं रणख्याती। जाणवेल तुझी शक्ती। शस्त्रप्रयुक्तिपर्यावो[3]॥९५॥ महाशूरांचें लक्षण। करोनि दाविती रणकंदन। वृथा वल्गोनि काय कारण। भुंके श्वान तैसा तूं॥९६॥

त्यामुळे रावणाचा क्रोधावेश : ऐकोनि सौमित्रवचन। क्रोधें खवळला रावण। घृतें खवळे हुताशन[4]। तेंवी दशानन क्षोभला॥९७॥ नेत्र भवंडी गरगरां। दांत खात करकरां। मस्तक पिटी सैरां। या रघुवीरा काय करूं॥९८॥ आतां काय करूं विंदान। माजवीन रणांगण। तृप्त करीन भूतगण। तैं रावण मी सत्य॥९९॥ ऐसें बोलतां लंकानाथ। भूतें शकुन मानित। रावणें भूतगण तृप्त। भाष्य वदत वाग्देवी॥१००॥ क्रोधें खवळोनि रावण। धनुष्यमुष्टि सज्जून। वेगीं चढवोनियां गुण । सीतीं बाण लाविला॥१॥ बाण ओढोनियां कानाडी। गर्जोनियां हाक फोडी। श्रीरामा साहें माझी वोढी। रणनिर्वडी पुरुषार्थ॥२॥

राक्षस व वानरांचें भयंकर युद्ध : तंव उठावलें सकळ दळ[5]। रणीं उठला हलकल्लोळ। भिडती राक्षस गोळांगूळ। युद्ध तुंबळ मांडलें॥३॥ राक्षस बळें हाणिती काती । वानर हाते झेलिती। फिरवोनि तेचि ओपिती[6]। लोळवित राक्षसां॥४॥ राक्षस ओपिती भाले। फुटती वानरांचीं कपाळें। अशुद्धें दिसती बंबाळें। सर्वांग निथळ[7] वानरांचें॥५॥ गैरिकादिक[8] धात। ओहळतां शोभे पर्वत। तेंवी वानरसैन्याआंत। शोभा अद्भुत वानरां॥६॥ तुटती वानरकपाळें। पुच्छें कमळोनि बळें। सर्वेचि भिडती गोळांगुळें। श्रीराम बळें अनिवार॥७॥ घावो लागे जेथ जेथ। श्रीरामचरणरज लाविती तेथ। तेणें कानपोनियां[9] खत। नामें गर्जत मारिती॥८॥ भाले त्रिशूळ मुद्गर काती। राक्षस निजबळें हाणिती। तें देखोनि जुत्पती। स्वयें विटाविती[10] राक्षसां॥९॥ वांकुल्या दावोनि तयांकडे। सवेंचि हाणिती पर्वतखडे। नामें गर्जती माकडें। भिडती निवाडें रणमारा॥११०॥ भिंडिमाळांचे[11] पांगोरे। राक्षस हाणिती तोमरें। धोंडे गुंडे पर्वतशिखरें। घेवोनि वानरें ठोकिती॥११॥ वीर खवळले अति क्रोधें। रणीं मातले रणमदें। एक नाचती युद्धछंदें। रणछंदें तळपती॥१२॥ थरक सरक उड्डाण। ओढणें धडकती तळपोन। वानर देवोनि किराण[12]। नेती हिसडोन हातियेरें॥१३॥ घायीं पडती वानरगण। ते श्रीरामपदरजेंकरून। तत्काळ होती सावधान। करिती गर्जन रामनामें॥१४॥ राक्षस पडती घायीं। त्यांसी उठविता कोणी नाहीं। राक्षसांचें सैन्य सर्वही। वानरीं पाहीं निवटिलें॥१५॥

रामांच्या हस्ते निधन होणारे भाग्यवंत राक्षस: श्रीरामाच्या दृष्टीपुढें। महावीर रणीं निधडे। घायीं पडले वाडेंकोडें। भाग्य केवढें सांगों मी॥१६॥ श्रीरामासंमुख रणांत। युद्धीं वीर ते

शब्दार्थ : १. कावळ्याचे, २. कौतुकाने, ३. कौशल्य, ४. अग्नी, ५. सैन्य, ६. टाकू लागले, फेकू लागले, ७. पागळू लागले, ८. काव, गेरू इत्यादी, ९. बरे होऊन, १०. वेडा, ११. गोफिणींचे, १२. उड्या.

पडत। त्यांच्या युद्धाचा निश्चितार्थ। सावचित्त परिसावा॥१७॥ घायीं शिर एक तुटलें। चढोनि इंद्रपदा गेलें। तेथील सुख नश्वर देखिलें। मग परतलें रामाकडे॥१८॥ श्रीरामदृष्टीपुढें। स्वर्गसुख तें बापुडें। श्रीरामचरणीं सुख गाढें[1]। जन्ममरण पुढें असेना॥१९॥ एक शिर हो उसळलें। सत्यलोकापर्यंत गेलें। भोगक्षयें पतन देखिलें। मग परतलें रामाकडे॥२०॥ आब्रह्मभुवनलोक। भोग तितुका कामनात्मक। ऐसें गीतावचन देख। म्हणोनि शिर परतलें॥२१॥ शिर उसळलें तुटोन। वैकुंठपर्यंत गेले उडोन। नावडे एकदेशी स्थान। धिक्कारून परतलें॥२२॥ सलोकसमीपस्वरूपता। वोसंडोनि सायुज्यता। श्रीरामचरणीं जीव अर्पितां। निजमुक्तता सहजचि॥२३॥ शिरें तुटोनि झडकरी। उडोनि जाती लोकांतरीं। तेथून परतती माघारीं। रामचरणांवरी स्वयें पडती॥२४॥ श्रीरामाचरणांपुढें। वैकुंठ कैलास नावडे। म्हणोनि हरिखे शिर मुरडे। चरणांवरी पडे श्रीरामाच्या॥२५॥ श्रीराम दृष्टी देखतां। भलत्याचेनि हातें मरतां। चहूं देहां देवोनि लाता। निजमुक्तता पावती॥२६॥ स्थूळ लिंग आणि कारण। चवथा देह महाकारण। निरसून तयांचें भान। श्रीरामचरण सेविती॥२७॥ शिरें परतोनि मागुती। श्रीरामातें ओंवाळिती। येवोनि चरणांवरी पडती। उत्तीर्ण होती चहूं देहां॥२८॥ मागिले जन्माचें उसणें। वीर काढिती श्रीरामचरणें। उसण्याघायीं संमुख मरणें। जन्ममरणधरणें उठविती॥२९॥ तें देखोनि समस्तां। वीरां आवेश बहुतां। युद्ध करितां साटोपता। फाडावया खता जन्माच्या॥१३०॥ युद्ध करितां महावीरीं। सरली शस्त्रास्त्रांची सामग्री। मग मल्लयुद्धकुसरी। वीरीं वानरीं मांडिली॥३१॥ सडका घालिती परस्परीं। थडका हाणिती येरयेरीं। उरीं शिरीं खांदी कोपरीं। जानूंवरी ताडिती॥३२॥ एक ते मागें सरती छागयुद्धें[2] सर्वेचि भिडती। अंगीच्या रोमा पिंजारिती। मग मिसळती कुक्कुट जैसे॥३३॥ युद्ध करिती विविध। घारयुद्ध श्येनयुद्ध[3]। महाखरांचें खरयुद्ध। मार विविध पैं त्यांचा॥३४॥ मागें फिरती वाडेंकोडें। परतोनि हाणिती लाताडें। त्यांसी पायीं धरिती माकडें। भवंडोनि कोडें त्राहाटिती॥३५॥ मरतां राक्षस बोलती। श्रीरामें थोर युद्धख्याती। युद्धीं परमानंद प्राप्ती। सायुज्य मुक्ती पावलों॥३६॥ युद्ध नव्हे हा परमानंद। रण नव्हे आनंदकंद। राम ओळला सच्चिदानंद। अगाध बोण रणरंगीं॥३७॥ राम परमामृत पुतळा। राम मुक्तीचा जिव्हाळा। राम आनंदाची कळा। पाळी लळा सकळांचा॥३८॥ द्वेषबुद्धीं युद्ध करितां। वैरिया दे सायुज्यता। अगाध बोध रघुनाथा। परमानंदता अरिमित्रीं॥३९॥ रावण रामाचा नव्हे वैरी। तारक आमुचा निर्धारीं। ज्याच्या द्वेषबुद्धिकरीं। राम तारी राक्षसां॥१४०॥ वीरां वानरां रणीं। थोर झाली झोंटधरणी। राक्षस निमाले रणीं। रथचक्रश्रेणींसमवेत॥४१॥ सैन्य निमालें अपरिमित। अश्वगजरथसमवेत। रणकर्दम झाला तेथ। पूर वाहत रूधिराचा॥४२॥ मज पाहतां निश्चितार्थ। रुधिर नव्हे तें परमामृत। तयामाजी जे लोटत। ते नित्यमुक्त स्वयें होती॥४३॥ मोक्षाचिया आशा जाण। वीर बळेंचि देती प्राण। रणीं वोळला[4] रघुनंदन। निशाचरगण उद्धरिले॥४४॥बहुसाल सैन्य मरतां। क्रोध आला लंकानाथा। रणीं जिंकावया रघुनाथा। साटोपता चालिला॥४५॥ जेंवी पतंग दीपावरी। गज जेंवी केसरीवरी[5]। तेंवी आवेशें दशशिरी। श्रीरामावरी चालिला॥४६॥ कुचभाराचें उभारणें। तयाचि नांव पडणें। तेंवी मरावया रावणें। मांडिलें येणें समरंगणीं॥४७॥

**इंद्र श्रीरामांना रथ पाठवितो :** अति गर्वें गर्वोन्मत्ती। घेवोनि शस्त्रास्त्रसंपत्ती। रावण चालिला रामाप्रती। भेणें कापती सुरवर॥४८॥ सबळ बळें लंकापती। रावणाचा रथ लीलागती।

**शब्दार्थ :** १. मोठे, २. बोकडाचे युद्ध, ३. ससाण्यासारखे युद्ध, ४. तुष्ट झाला, ५. सिंहावर.

रामा एकला पदाती[1]। युद्धख्याती केंवी होय।।४९।। एकाकी भिडतां रावणाप्रती। साह्य न पाहे सांगाती। एकांगवीर रघुपती। करील शांती रावणाची।।१५०।। संदेह नाहीं ये अर्थी। राम धर्माची धर्ममूर्ती। सौमित्रा न सांगे सर्वांर्थी। करील ख्याती निजांगें।।५१।। राम कार्य साधील न चुके। रावण निवटील बाणें एकें। सुर सोडवील कौतुकें। भरेल हरिखें त्रैलोक्य।।५२।। कांही स्वहितालागीं जाणा। साह्य व्हावें रघुनंदना। म्हणोनियां सहस्रनयना[2]। अवस्था दुणी लागली।।५३।। आजवरी श्रीरामसेवा। अंश घडली नाहीं केव्हा। तेणें आतुडलों दशग्रीवा। घेत सेवा निजबळें।।५४।। तो सूड घ्यावयासी। साह्य होणें श्रीराघवासी। पाचारोनि सारथ्यासी। करवी रथासी सन्नद्ध।।५५।। संजोगोनियां स्यंदन। ठाकून जाय रघुनंदन। रथीं करोनि आरोहण। राम रावण निवटील।।५६।। एक जनार्दना शरण। श्रोतीं व्हावें सावधान। पुढील रामरावणांचें रण। अति दारुण परिसावें।।५७।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणयुद्धागमनं नाम नवपंचाशत्तमोऽध्यायः।।५९।। ओंव्या ।।१५७।। श्लोक।।१३।। एवं।।१७०।।

## अध्याय साठावा

।। श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### रावणाने रामांचा ध्वज तोडला

मातलीचे रथासह आगमन व श्रीरामांना वंदन : मातलि सारथि विचक्षण[3]। घातलें इंद्रा लोटांगण। येरें देतां आज्ञापन। करी संयोजन रथाचें।।१।। रावण दुरात्मा चांडाळ। बंदी घातले सुर सकळ। तेणें अत्यंत तळमळ। लागली प्रबळ मातलीसीं।।२।। आपुला स्वामी सुरपती। सेवा घेतो त्याचे हातीं। तेथें येराची कवण गती। लंकापति भला नव्हे।।३।। तेणें क्रोधें करोनि जाण। केलें रथसंयोजन। शस्त्रास्त्रें सकळ भरून। सामग्री दारुण घातली।।४।। कवचें खड्गें अत्यद्भुत। मंत्र तंत्र क्रियायुक्त। रणसामग्री समस्त। रथ त्वरित सिद्ध केला।।५।। आज्ञा पुसोनि इंद्रासी। मातली निघाला वेगेंसीं। ठाकून आला शीघ्रतेसीं। मृत्युलोकासीं रणभूमी।।६।। हातीं घेवोनि धनुष्यबाण। रणीं उभा रघुनंदन। तंव इंद्राचा रथ घेऊन। मातलि आपण तेथें आला।।७।। देखोनि श्रीरामासी। सुख झालें मातलीसीं। आनंद भरला सर्वांसी। निजोल्लासीं डुल्लत।।८।। पाहतां श्रीरामाकडे। यम काळ तें बापुडें। रावण दहा तोंडांचें किडें। बाणझडाडें मरेल।।९।। हें निश्चित माझें वचन। तथापि स्वामीचें आज्ञापन। श्रीरामासी रथनिवेदन। करोनि रावण मारावा।।१०।। श्यामकर्ण अति शोभत। श्वेत वारुवीं जुंपिला रथ। विचित्राभरणीं अति मंडित। वारू गर्जत शत्रुनिधनें।।११।। चाकें नीळाचीं अति कठिण। सुवर्णबंदी शोभायमान। आंख वज्राचा सुलक्षण। रथचक्रीं पूर्ण बोलिला।।१२।। धुरा वैडूर्याच्या सुरेखा। सांटा[4] पाचुबंदी नेटका। मरकताचा[5] ध्वज देखा। लोला[6] पताका शोभती।।१३।। ज्वाळमाळाकिंकणी[7-8]। घंटा वाजती गजरें करोनी। खणणिला रत्नाभरणीं। श्रीरामालागूनी आणिला।।१४।।

तं रथं समुपादाय मातलिः शक्रसारथिः। अभ्यद्रवत काकुत्स्थमवतीर्य त्रिविष्टपात्।।१।।
अब्रवीदग्रतो रामं सप्रतोदो रथे स्थितः। प्रांजलिर्मातलिर्वाक्यं सहस्राक्षस्य सारथिः।।२।।

---

शब्दार्थ : १. पादचारी, २. इंद्राला, ३. हुशार, ४. सांगाडा, ५. पाचेचा, ६. हालणाऱ्या, ७-८. अग्निज्वालेप्रमाणे देदीप्यमान, घागऱ्या.

सूर्यप्रभेसमान। सायुध रथ सांगत्राण[1]। मातलि घेवोनि आला जाण। रघुनंदन जेथें होता॥१५॥ हातीं आसूड वागोरी[2] असतां। रथाखालीं नुतरतां। नमन केलें रघुनाथा। अति चतुरता सारथ्याची॥१६॥

मातलीचे निवेदन व युद्धसाहित्य समर्पण : सारथ्याची धर्म ऐसा आहे। रणामाजी निघोनि पाहे। साश्वरथ सोडूं नये। नमिता होये वरूनचि॥१७॥ ऐक स्वामी रघुनाथा। तुझा अवतार सुरकार्यार्था। वधावया लंकानाथा। रणा तत्वतां आलासी॥१८॥ देव घातले बांदवडीं। देखोनि त्यांची करुणा गाढी। धांविन्नलासी निजप्रौढी। अति कडाडीं रघुनाथा॥१९॥ रणामाजीं लवडसवडी। निवटिल्या राक्षसकोडी। नाचविली रणधांगडी। अर्धघडी न लागतां॥२०॥ आतां निवटिल्या रावण। मग आमुचें कार्य कोण। साह्य न होऊंचि रघुनंदन। सहस्रनयना अति लज्जा॥२१॥ म्हणोनि दास्यालागीं तत्वतां। रथ पाठविला रघुनाथा। यावरी बैसोनियां आतां। लंकानाथा निवटावें॥२२॥ रावण रथी राम पदाती। हें न साहेचि देवांप्रती। म्हणवोनियां रघुपती। रथ तुजप्रती पाठविला॥२३॥ तुज न लागे रथ सारथी। निजांगें करोनि ख्याती। निवटावया लंकानाथाप्रती। निमेषगती लागेना॥२४॥ ऐसें जाणतसों सकळिक। तरी इंद्र सेवेलागीं देख। रथ पाठवी सुरनायक। बैसोनि दशमुख निवटावा॥२५॥ तुज विजयालागीं रघुपती। सकळ शस्त्रास्त्रसंपत्ती। पाठविली अमरपती। लंकापती निवटावया॥२६॥

इदमैंद्रं महाचापं कवचं चाग्निसन्निभम्। शराश्चादित्यसंकाशाः शक्तयो विमलाः सिताः॥३॥
आरुह्य च रथं राम राक्षसं जहि रावणम्। मया सारथिना सार्धं महेंद्र इव दानवान्॥४॥

हें घे इंद्राचें महाधनुष्य। शत्रुनिर्दळणीं कर्कश। ओढी काढोनि सावकाश। दशमुखास निवटावें॥२७॥ अग्निप्रभेसमान जाण। हें घे अंगत्राण। आंगी घालोनि आपण। शत्रुनिर्दळण करावें॥२८॥ सूर्यप्रभेसमान शर। रुक्मपुंखी सपरिकर। चापीं सज्जोनि वेगवत्तर। दशवक्त्र निवटावा॥२९॥ अति मोहका विमलशक्ती। रणीं दुर्धर शत्रुघाती। तुज पाठविल्या अमरपती। रघुपति महावीरा॥३०॥ मजसमवेत रघुपती। बैसोनियां इंद्ररथीं। महेंद्र निवटी दानवपंक्ती। तेंवी लंकापती निवटावा॥३१॥

रामाची मनःस्थिती, बिभीषणाची विनंती : ऐकतां मातलीचें वचन। हांसोनि बोले रघुनंदन। रथसारथियाचें कार्य कोण। मजलागून रणरंगी॥३२॥ रावण बापुडें मशक। दहा मुखांचें किडें देख। त्यासाठीं काय साधक। न लागतां निमेख निवटीन॥३३॥ म्हणोनि राम हास्यवदन। तें जाणोनियां चिन्ह। पुढें झाला बिभीषण। अति विचक्षण बोलका॥३४॥ जाणे श्रीरामाचें बळ। रणसंग्राम रणशीळ। न लागतां अर्ध पळ। राम निवटील रावणासी॥३५॥ तरी इंद्राचें मनोगत। रक्षावें जी निश्चित। म्हणोनियां अति विनीत। स्वयें प्रार्थित श्रीरामा॥३६॥ करकमळ जोडूनि पाहीं। मस्तकांजळी लवलाहीं। लागला श्रीरामाच्या पायीं। विनंती कांही परिसावी॥३७॥ रथारूढ रघुपती। रणामाजी रणख्याती। करितां देखावा अति प्रीतीं। ऐसें चित्तीं बहुतांचे॥३८॥ राम अलंकारा भूषण। राम रथा रथगति जाण। शस्त्रास्त्रांचे मारकपण। स्वयें आपण श्रीराम॥३९॥ ज्यासी नाहीं नांवरूप। वेदांसी न कळे स्वरूप। तेणें आम्हांसाठीं धरोनि रूप। भक्तसंकल्प पुरवित॥४०॥ निजभक्तांचें मनोगत। संरक्षावें यथातथ्य। हें श्रीरामाचें निजव्रत। निश्चितार्थ वेदवाणी॥४१॥ आपुले निजच्छंदें। निजभक्त कल्पिती विनोदें। तितुकें अंगीकारी स्वानंदें। अद्वैतद्वंद्वें घेवोनी॥४२॥

---

शब्दार्थ : १. कवचासह, २. लगाम.

लाडकिया भक्तांची स्थिती। युक्तायुक्त नेणती। तरी अंगीकारी रघुपती। भक्तप्रीतीं भूलला।।४३।। अनावरासी[1] अधिष्ठान। सर्वगतासी आवाहन। चिदंबरा प्रावरण। मूर्ख जन कल्पिती।।४४।। अधिष्ठानासी आसन। कल्पिती अबळ भक्तजन। तथापि लाजेना रघुनंदन। पीतवसन अंगीकारी।।४५।। श्रीरामा सकळांचा शेवट। त्यासीही कल्पिती मुकुट। आभाळासी मळवट। श्रवणपाठ अश्रोत्रा[2]।।४६।। विश्वमुखासी संख्यात्मक। वाणीचें कल्पिती मुख। एक्या अवदानें तृप्ति देख। मानिती आवश्यक नित्यतृप्ता।।४७।। विश्वबाहूसी परिमित हात। विश्वहृदय हृदयीं रिघत। स्रक्चंदनादि समस्त। भोग अर्पिती निजावडीं।।४८।। ज्यामाजी अनंत ब्रह्मांड खेळे। तो भक्तभावार्थमेखळे। माजी सकळां आकळे। निजभक्तलळे पाळित।।४९।। श्रीराम सकळांची गुह्यराशी। झांकावया त्याच्या गुह्यासी। पीतांबर अर्पिती प्रेमेंसीं। येरू आवेशीं ओढित।।५०।। अचरणा कल्पिती चरण। जें त्रिवेणीचें जन्मस्थान। तेथें घालिती वाणीचें जीवन[3]। चरणक्षाळण करावया।।५१।। श्रीराम लेणियांचें लेणें। त्यासी देती रत्नभूषणें। त्या अंगिकारिसी प्रेमें जेणें। रथ भावें तेणें अंगीकारीं।।५२।।

सुग्रीव, अंगद आणि मारुती वगैरेंची विनंती: म्हणोनि घातलें लोटांगण। देखोनि राम हास्यवदन। वेगें उठोनि आपण। हृदयीं धरोन आलिंगिला।।५३।। अति चतुर बोलका होसी। म्हणोनि धरिला पोटासीं। अंगीकारोनि वचनासी। आरोहणासी[4] सरसावला।।५४।। तंव सुग्रीव राजा सुबुद्धी। अलंकार अर्पिलें उदधीं[5]। ते आणिले तेच संधीं। स्वामी हे आधीं अंगीकारीं।।५५।। तंव अंगदही उठावला। लोटांगण घालोनि वहिला[6]। श्रीराम स्वयें विनविला। ऐकावें बोला सकाळांच्या।।५६।। तंव विनविलें मारुती। जे विनविताती जुत्पती। तें ऐकावें रघुपती। वचन मानिती श्रीराम।।५७।।

श्रीरामांचा अंगीकार व तेजस्विता : अंगीकारोनि भूषणां। रथासी घालोनि प्रदक्षिणा। नमन करोनियां जाणा। केलें आरोहणा रथावरी।।५८।।

इत्युक्त्वा स परिक्रम्य रथं तमभिवाद्य च। आरुरोह रथं रामस्तदा लक्ष्म्या विराजयन्।।५।।
ततोऽभवन्महद्युद्धं सर्वेषां रोमहर्षणम्। राघवस्य महाबाहो रावणस्य च रक्षसः।।६।।

सालंकार रघुपती। बैसतांचि इंद्ररथीं। बाणली वीरश्री पुरती। दुर्धर शक्ती भासत।।५९।।

वानरांचा आनंद व त्यांचे श्रीरामास वंदन : प्रकाश पडला सोज्ज्वळ। दिशा उजळल्या सकळ। उजळलें नभोमंडळ। सुर सकळ आनंदले।।६०।। रथचक्रांचा घडघडाट। वारूंचा[7] वाजिन्नला साट। हाक फुटली अचाट। रजें अंबर[8] कोंदलें।।६१।। भारें मेदिनी दाटली। वराहाची दाढ तडकली। फडा शेषाची दडपली। लवविली मान कूर्में।।६२।। होतें सुरवरांचे चित्तीं। तें संपादिलें रघुपतीं। आनंदमय झाली वृत्ती। तेणें डुल्लती आनंदें।।६३।। रणीं विराजमान रघुपती। तेणें आनंदमय झाली वृत्ती। हनुमान येवोनि शीघ्रगती। जीवें रघुपती ओंवाळिला।।६४।। इटिमिटी घे बिभीषण। अंगदें केलें निंबलोण। सुग्रीवें येवोनियां जाण। श्रीरामचरण वंदिले।।६५।। नळ नीळ जांबवंत। जुत्पती हरिखले समस्त। पर्वत घेवोनि झेलित। रावणघात करावया।।६६।।

श्रीरामांचे क्रोधाविष्करण : युद्धीं जिंकोनि परशुरामासी। रामें पाठवितां तपासी। क्रोध होता तयापासी। तो श्रीरामासीं अर्पिला।।६७।। श्रीराम शांतीचें कल्याण। त्यासीं क्रोध कैंचा जाण। परशुरामें अर्पिला आपण। तेणें रघुनंदन सक्रोध।।६८।। जमदग्नीच्या तपःसामर्थ्ये। परशुरामाच्या पुरुषार्थे। अनुसरोनि श्रीरामातें। राक्षसनिधनातें खवळला।।६९।। तेणें क्रोधें रघुवीर। दिसे जैसा काळाग्निरुद्र। तैसा भासत भ्यासुर। दशवक्त्र निवटावया।।७०।।

---

शब्दार्थ : १.अमर्याद अशाला, २. कर्णरहिताला, ३. उदक, ४. चढण्याला, ५. समुद्राने, ६. सत्वर, ७. घोड्यांचा, ८. आकाश.

रामरावणांचे अस्त्र युद्ध : तैसाच रावण महावीर। क्रोधें खवळला दशवक्त्र। सिंहनादें गर्जे थोर। रहंवर[1] प्रेरिला।।७१।। पाचारोनि श्रीरामासी। बाण वर्षला वेगेंसी। मेघीं आच्छादिलें पर्वतासी। तेंवी श्रीरामासी झांकिलें।।७२।। श्रीरामें करोनियां लाघव। बाणें बाण निवारिले सर्व। तेणें क्षोभोनि दशग्रीव। मानी अपूर्व लघुवेग।।७३।। मग विचारिलें मानसीं। अहाच कळी न चले यासीं। मग समंत्र अस्त्रातें हातवसी[2]। श्रीरामासी भिडावया।।७४।। अभिमंत्रोनि पन्नागास्त्र[3]। रुक्मपुंख काढिले शर। संख्यारहित अनिवार। चापीं सत्वर सज्जिले।।७५।। तें संधान देखोनि दुरोनी। श्रीराम नेटका विंदानी। गरुडास्त्र योजिलें गुणीं। केली भंगाणी पन्नगांची।।७६।। निरसोनि पन्नगांचे भार। गरुडें गिळिले विखार[4]। झडपूं लागला निशाचर। करीत संहार सैन्याचा।।७७।। राक्षसमुंडें धरणीहूनी। गरुड खुडोनि ने गगनीं। चकित झाला दशाननी। अभिनव करणी देखोनी।।७८।। अत्यंत क्षोभला लंकापती। अग्निशस्त्र काढिलें नेगुतीं। अभिमंत्रोनि मंत्रोक्तीं। लाविलें सीतीं अति वेगें।।७९।। गुणीं ओढोनि कानाडी। बाण सोडितां झडाडी। डोळियां पडली झांपडी। अग्नि धडाडी देखिला।।८०।। भडके उठले प्रबळ। ज्वाळीं व्यापिलें अंतराळ। गरुड जाळिले सकळ। अग्नि प्रबळ खवळला।।८१।। शिखा[5] वाढल्या अलोलिक। जाळूं पाहती सत्यलोक। तें देखोनि रघुकुळटिळक। सत्वर देख सरसावला।।८२।। भडभडां जळती वानर। ते स्मरती श्रीरामचंद्र। सैन्य निमालें समग्र। अझूनि विचार तो कायी।।८३।। म्हणोनि खवळला रघुपती। कंकपत्री बाण निगुतीं। काढोनि लाविला सीतीं। मंत्रशक्तीसमवेत।।८४।। बाणीं योजिलें पर्जन्यासी। क्षणें विझविलें अग्नीसी। त्याहीमाजी युक्ति कैसी। वानरांसी उल्हास।।८५।। अमृतवृष्टि वानरां। तेचि राक्षसां वज्रधारा। श्रीराम लाघविया खरा। वानरभारा वांचविलें।।८६।। एकेचि संधानें रघुपती। नवल केली युद्धख्याती। एका मुक्ति एका विश्रांति। समान प्राप्ती अरिमित्रां[6]।।८७।। पर्जन्यवृष्टि वज्रधारा। तेणें मोक्ष निशाचरां। तेचि अमृतवृष्टी वानरां। नवल रघुवीराचें करणे।।८८।। नाम स्मरतां रघुवीर। ताप निमाला समग्र। वानर विश्रांति बाह्यांतर। करीत भुभु:कार ऊठिले।।८९।। भुभु या शब्दाचा अर्थ। पुन:पुन: रघुनाथ। अनिमेषें जें स्मरत। ते नित्यमुक्त संसारीं।।९०।। त्यांसी वर्तती देहगेहीं। संसारभय अणुमात्र नाहीं। सकळ विषयांच्या ठायीं। निर्विषय पाहीं विचरत।।९१।। हा वानरांचा निश्चय पूर्ण। म्हणोनियां रामस्मरण। अहर्निशीं करितां जाण। क्षण क्षण सावध।।९२।। येरीकडे रावणकटक। पर्जन्यें निमालें सकळिक। वज्रपाय थेंबुटा एकैक। लागतां देख निमताती।।९३।। ऐसें बहुसाल सैन्य मरतां। अति चिंता लंकानाथा। जें तें शस्त्र जातें वृथा। श्रीरघुनाथा केंवी जिंको।।९४।।

रावणाने वाय्वस्त्र सोडल्यावर मारुतीचे वायूला आव्हान : अति वृष्टि व्हावया दूरी। रावण वाय्वस्त्र प्रेरी। हाक देवोनि दशशिरी। रणामाझारीं गर्जत।।९५।। मेहुडें[7] उडालें तत्काळ। वायु सुटला प्रबळ। उडवित आला वानरदळ। गोळांगूळ त्रासिले।।९६।। दोहीं डोळां भरली धुळी। गात्रें कांपती चळचळीं। नेट न धरवे पायांतळीं। वानर अंतराळीं उडविले।।९७।। आवर्त[8] सुटला भारी। वानर भ्रमती गगनांतरीं। तें देखोनि कपिकेसरी। कोपेंकरीं खवळला।।९८।। करोनि नामाचा भुभु:कार। पुढें होवोनि हनुमान वीर। पितृस्नेहें कळवळिला थोर। काय उत्तर बोलत।।९९।। वायु हनुमंताचा पिता। तेणें त्यासी तो म्हणे ताता। वैभव नेणतां रघुनाथा। निजघाता पावसी।।१००।। श्रीरामें सोडोनियां बाण। उडविलें शून्याचें शून्यपण। तेथें तुम्हांसी वांचवी कोण। गमनागमनसंचारा।।१।। तूं आमुचा निजपिता।

---

शब्दार्थ : १. रथ, २. हातात घेतले, स्वीकार केला, ३. सर्पास्त्र, ४. सर्प, ५. ज्वाला, ६. शत्रू आणि मित्राला, ७. मेघ, पर्जन्य, ८. वावटळ.

म्हणवोनि भीड रघुनाथा। नाहीं तरी करिता तुझ्या घाता। क्षणही तत्वतां लागेना ॥२॥ ताता पूर्वसंकल्प तुझा। जे सेवेलागीं रघुराजा। युद्धीं भिडतां राक्षससमाजा। प्रतिकूळ सहजा मी त्यासीं ॥३॥ तें तूं नाठविसी जरी। श्रीरामाच्या बाणदारीं। तुझी होईल बोहरी। क्षणमाझारी प्रभंजना[१] ॥४॥

वायूचे उपशमन व प्रतिक्रिया: ऐकतां हनुमंताचें उत्तर। मंत्रदेवता वेगवत्तर। येवोनि नमिला रघुवीर। फिरली सत्वर रावणावरी ॥५॥ सोडून वानर सकळ। आकळिलें राक्षसदळ। आवर्त सुटला सबळ। प्राणांत केवळ मांडला ॥६॥ वायुबळें सबळ प्राण। तो वायु क्षोभला आपण। आतां राक्षसां राखे कोण। दशानन सचिंत ॥७॥ उफराटें झालें कोडें[२]। माझींचि शस्त्रें मजकडे। फिरोनियां वाडेंकोडें। सैन्य निवाडें निवटीत ॥८॥ तें देखोनि श्रीरामासी। हांसों आलें निजउल्हासीं। अतर्क्य युक्ति हनुमंतासी। म्हणोनि पोटेंसीं धरियेला ॥९॥

रावणाचे आश्चर्य व पर्वतास्त्रप्रयोग: येरीकडे वीर रावण। मरतां देखोनियां सैन्य। वायु निवारावया आपण। पर्वतास्त्र पूर्ण आड घाली ॥११०॥ तेणें बुजोनि सांडिला वारा। सावध करितां निशाचरां। श्रीराम लाघविया खरा। योजिलें वज्रास्त्रा विनोदें ॥११॥

श्रीराम वज्रास्त्र आणि विषुचिका सोडतात : सोडूनि विषूचिकास्त्र[३]। त्यांत योजिले वज्रास्त्र। वज्रें पर्वत करोनि चूर। रणीं समग्र त्रासिले ॥१२॥ विषूचिकेचें बळ दुर्धर। घोळसिला राक्षसभार। तरळा[४] झालिया वेगवत्तर। वीरें वीर पडियेले ॥१३॥

त्याचे परिणाम : हागी ओकी सुटली रणीं। वीर सरती दोहीं वदनीं। वस्त्रें घाणती पोहणीं[५]। उठली घोंगाणी[६] रणरंगी ॥१४॥ एक गडबडां लोळती। एक डोळे वटारिती। एक हात पाय ताणिती। सकळ जुत्पती हांसती तेव्हां ॥१५॥ हांसतसे बिभीषण। हांसतसे लक्ष्मण। हांसतसे वायुनंदन। नवल काय श्रीरामीं ॥१६॥ हरिखल्या वानरकोडी। राम निजयोद्धा निजगडी। रणीं नाचविली रणधांदडी। राक्षसकोडी निवटिल्या ॥१७॥ तेणें खळवळिला रावण। ते विषूचिका धांवोन। वेगीं आली ठाकून। दशानन जेथें होता ॥१८॥ तेणें झाला वमनोद्गार। ताणताती वीसही नेत्र। वमनउसळीची धार। लागली थोर दशमुखा ॥१९॥ विकळ होतां दशानन। वेगें स्मरला त्रिनयन । तेणें विषुचिका निरसोन। केलें सावधान रावणा ॥१२०॥

उभयतांचे झालेले अस्त्रयुद्ध : सर्वेचि खवळोनी दशशिर। एके वेळे शस्त्रसंभार। वर्षता झाला अपार। श्रीरघुवीर लक्षोनी ॥२१॥ दंडास्त्र आणि खंडास्त्र। वितंडास्त्र आणि प्रचंडास्त्र। घातनास्त्र आणि पातनास्त्र। दशवक्त्र वर्षला ॥२२॥ एके वेळे शस्त्रकल्लोळ। रणीं उठला हलकल्लोळ । खळबळिलें वानरदळ। प्रळयकाळ मांडला ॥२३॥ शस्त्रें कडाडिलीं आकाशीं। अग्निज्वाळा दशदिशीं। प्रळय मांडिला सकळांसी। अंतकासी आकांत ॥२४॥ वानर पळती दशदिशा। एकाचा दाटला घसा। एकीं सांडियेला धिंवसा[७]। रणीं लंकेशा देखोनी ॥२५॥ घालिती येरयेरां मिठी। झोंबती हनुमंताचे कंठी। आम्हां सोडवी रणसंकटी। प्राण कंठी उरलासे ॥२६॥ जरी प्रार्थू श्रीरामासी। तरी भीड न वचे आम्हांसी। प्रार्थोनियां राघवासी। अस्त्रघातासी निवारीं ॥२७॥ ऐसें बोलोनि वानरवीर। भयातुर झाले समग्र। मिळोनि जुत्पती थोर थोर। देती धीर कपींसी ॥२८॥ तें देखोनि रघुनाथ। क्रोधें झाला पैं कृतांत। निवारावया अस्त्रघात। लाघव करित तें ऐका ॥२९॥ संधानामाजी संधान। करिता झाला रघुनंदन। अस्त्रें अस्त्र निवारून। धनुष्य जाण छेदिलें ॥१३०॥ अदंडें दंडिलें दंडासी। अखंडें खंडिलें खंडासी। संजीवनें घातनासी। अस्त्रें अस्त्रासी दंडिलें ॥३१॥ रावणशस्त्रें अति अवघड। वितंडास्त्र आणि प्रचंड। त्यावरी घातलें अकांडकांड। केले खंडविखंड पैं तेणें ॥३२॥

---

शब्दार्थ : १. हे वायो, २. योजलेली युक्ती, ३. विषूचिका- महामारी, ४. हगओकीचा विकार, ५. दुर्गंधीने, ६. घो घो असा शब्द, ७. धैर्य.

राम रावणाची धनुष्ये तोडतात : राम धनुर्वाडा विचक्षण। दारुणास्त्रें निवारून। रावणाचे धनुष्य जाण। न लागतां क्षण छेदिलें॥३३॥ अद्वैत साधोनि विंदान। पातनासी केलें पतन। पतनीं पडावया जाण। रितें गगन असेना॥३४॥ तेणें तळमळी रावण। वृथा गेलें अस्त्रसंधान। हातींचें छेदिलें धनुष्यबाण। राम दारुण रणयोद्धा॥३५॥ रागें दोनी हात चुरी। आणिक धनुष्य दिधलें करीं। तें छेदिलें झडकरीं। बाणधारीं श्रीरामें॥३६॥ आणीक धनुष्य आणवित। तेंही छेदी श्रीरघुनाथ। संख्या झाली शतें शत। धनुष्यें समस्त वेंचिलीं[१]॥३७॥ तेणें तळमळी दशाननी। वायां गेली उग्र करणी। शंख करी दशवदनीं। राम रणीं नाटोपे॥३८॥ हरिखेला वानरभार। अवघे करिती भुभु:कार। स्वर्गी मिळोनी सुरवर। जयजयकार करिताती॥३९॥ दुष्ट दुराचारी रावण। श्रीराम रणयोद्धा दारुण। अप्रतिम मल्ल दोघे जण। दोघे विचक्षण रणरंगी॥१४०॥ त्यांचें पहावया रण। यक्ष गंधर्व सिद्ध चारण। स्वर्गी मिळाले सुरगण। पुष्पवृष्टी जाण तिहीं केली॥४१॥ वानर नाचती पैं रणीं। उडती उलट्या किराणीं। श्रीराम विजयी रणांगणीं। दशवदनी निवटिला॥४२॥ अवघे करिती जयजयकार। नामें गर्जती वानर। तेणें दुखावला दशशिर। लाज थोर पैं झाली॥४३॥

रावण गुरुदत्त परिघाचा प्रयोग करितो : दांत करकरां खात। रागें दोनी हात चुरित। परिघ घेतला गुरुदत्त। लक्षून रघुनाथ हाणावया॥४४॥ तंव गुरूचाही निजगुरु। राम परात्पर सद्गुरु। तयावरी शस्त्रसंहारु। मूर्ख दशशिर करूं पाहे॥४५॥ तरी नीतीची नीति रघुनंदन। राम शास्त्रीं शास्त्रार्थ पूर्ण। गुरुनाम ऐकतां जाण। शस्त्रप्रहार आपण आवरिला॥४६॥ जगद्गुरु जनीं जनार्दन। व्यापक गुरुनामें म्हणेन। तें ऐकतां रघुनंदन। अवज्ञा हेळण न करीचि॥४७॥ जेथें गुरुआज्ञापरिपाळण। येथें सर्वदा विजय पूर्ण। गुरु संरक्षिता आपण। निजगणा विघ्न शिवों नेदी॥४८॥

देवादिकांना चिंता : परिघ सोडितां रावण। कडाडिलें त्रिभुवन। आकांतले सुरगण। विमानें तुटोन पडों पाहती॥४९॥ उमा शंकरातें [२]आकळी। दिग्गजांची बैसलीं टाळीं। प्रळयकाळा दांतखिळी। झांपडी पडली सुरसिद्धां॥१५०॥ इतुकें देखोनि विंदान। उगाच पाहतो रघुनंदन। गुरुअवज्ञा न करीच जाण। शस्त्रें दारुण असतांही॥५१॥ परिघ येवोनि तत्वतां। ओवाळोनि रघुनाथा। ध्वजीं आदळोनि अवचितां। पडिला खालता आज्ञाबळें॥५२॥ परिघ ज्ञाता संपूर्ण। उभयआज्ञा संरक्षण। इंद्राचा ध्वज छेदून। तळीं आपण पडियेला॥५३॥ तंव झाला हाहाकार। खळबळिला वानरभार। सुरवरां आकांत थोर। चिंतातुर सहस्राक्ष॥५४॥ सकळीं संतोष मानिला होता। राग निवटील लंकानाथा। बंदिमोचन समस्तां। श्रीरघुनाथाचेनि धर्मे॥५५॥ तें झालें वाताहत। परिघ पातला कंदन करित। केंवी वांचेल रघुनाथ। थोर आकांत सकळिकां॥५६॥ ध्वज तोडोनियां तरी। परिघ परतो हा झडकरी। श्रीराम वांचे जीवें जरी। तरी मारील रावणा॥५७॥ श्रीराम रणदिवाकर। रणीं उगवतां प्रकाशकर। रावणराहु वेगवत्तर। येवोनि सत्वर गिळियेला॥५८॥ आमची पुण्यसामग्री जितकी। श्रीरामा पावों असकी[३]। राम पडिला रावणमुखीं। तो एकाएकीं सुटावा॥५९॥ ऐसे झाले चिंतातुर। तंव परिघें वेगवत्तर। नमियेला श्रीरामचंद्र। अस्त्रा अस्त्र श्रीराम॥१६०॥ राम शस्त्रास्त्रांचें निज। राम मंत्रांचें निजबीज। राम वीराधिराज। राम सहज परब्रह्म॥६१॥

परिघाचे श्रीरामांस नमन: राम चैतन्याची मूर्ती। राम शस्त्राची मारक शक्ती। तो राम

शब्दार्थ : १. खर्ची पडली, २. आलिंगी, ३. संपूर्ण.

असतां रथीं। रावण तें किती बापुडें।।६२।। परी कृपाळु भक्तजना। खेळवीतसे रावणा। हावभरी करोनि जाणा। दशवदना निवटील।।६३।। एका जनार्दना शरण। श्रीरामरथींचा ध्वज जाण। वेगें छेदोनि रावण। करीत गर्जन ऊठिला।।१६४।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रघुनाथध्वजच्छेदनं नाम षष्टितमोऽध्यायः।।६०।। ओंव्या।।१६४।। श्लोक।।६।। एवं।।१७०।।

## अध्याय एकसष्टावा

।। श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ।।

### राम-रावण - युद्धवर्णन

रावणाची गवोक्ती व गर्जना : परिघें नमिलें रघुपतीं। तें न देखेच लंकापती। अति गर्वाची गर्वोन्मत्ती। अंधवृत्ती होवोनि ठेली।।१।। गर्वे गर्जत रावण। श्रीरामातें लक्षून। झणें करिसी पलायन। दशानन देखोनी।।२।। वानरांचा आश्रय धरून। मजसीं करूं आलासि रण। त्यांसहित तुज निवटीन। अर्धक्षण न लागतां।।३।। आम्हां राक्षसांचें भक्ष। देखा मनुष्य प्रत्यक्ष। वानरभार सावकाश। कोशिंबिरीस न पुरती।।४।। ते तुम्ही आज मजसीं। रणीं भिडलां रणमारेंसीं। तैं उबगलेती जगासी। पाहूं आतां पुरुषार्था।।५।। स्त्रिये मारिलें ताटकेसी। मारिलें मारीच मृगासी। इतुक्यासाठीं आपणासीं। संभावितोसी[1] वीरवृत्ती।।६।। जुनें कीडखादलें कांबिट। ओढितां मोडलें अवचट। तेणें बळें वीर उद्भट। तुज मर्कट मानिती।।७।। बापुडें परशुराम ब्राह्मण। त्यापुढें तुझी आंगवण। वनीं धाडिलें भेडसावून। तें विंदान येथें चालेना।।८।। युद्ध न करवेचि समरांगणीं। वाळी मारिला कपटेंकरोनी। तेणें निर्भात्सिलें ते क्षणीं। लाज मनीं असेना।।९।। नळाच्या हातीं तरती शिळा। तो सेतु रामें बांधिला। मूर्ख बोलती या बोला। ताठा चढला तुज तेणें।।१०।। आतां जाणवेल बळ। करोनि दावीं रणकल्लोळ। म्हणोनि गर्जत तोंडाळ। पण मनीं प्रबळ धुकधुक।।११।।

परिघ तुटल्यावर रामांनी जमिनीवरून युद्ध सुरू केले : जेंवी कां पुळियीचा कांटा। पुढें तिखट मागें पोंचटा। तेंवी रावण वीर लाठा। रणचौहटां गर्जत।।१२।। येरीकडे रघुनंदन। ध्वज तुटला देखोन। तळीं उतरला आपण। रणकंदन करावया।।१३।। म्हणोनियां स्यंदन[2]। स्वयें सोडी रघुनंदन। रथाचें मज कार्य कोण। करीन रण निजांगीं।।१४।। आरुढोनि रथासी। जरी निवटीन रावणासी। लौकिकीं प्रथा[3] होईल ऐसी। सामर्थ्य रामासीं असेना।।१५।। रथबळेंकरोनि जाण। रणीं निवटिला रावण। एवढी अपकीर्ति साहे कोण। म्हणोनि आपण उतरला।।१६।।

रावणाची गर्जना : तें देखोनि रावण। अधिक गर्जे संतोषोन। राम विरथी केला जाण। हाक फोडून गर्जत।।१७।। अहंरावण निजमदेंसीं। सज्जोनि निर्वाणशस्त्रांसी। वेगीं चालिला क्रोधावेशीं। रणीं रामासीं भिडावया।।१८।। निजाभिमानाची सामग्री। रावणें घेवोनि झडकरी। पतंग झेंपावे दीपावरी। तेंवी श्रीरामावरी चालिला।।१९।।

स्वर्गात प्रचंड खळबळ व श्रीविष्णूंची प्रार्थना: देखोनि रावणाच्या बळा। स्वर्गीं सुटला खळबळा। आकांत सुरसिद्धां सकळां। जगतीतळा आकांत।।२०।। दुर्धर देखोनि रावण। स्वर्गीं सुरसिद्धगण। मिळोनियां सकळ जन। विष्णूचें स्तवन आरंभिलें।।२१।। धांव पाव गा अच्युता। भक्तवत्सला अनाथनाथा। पावावें सुरकार्यार्था। लंकानाथा निवटावया।।२२।।

---

शब्दार्थ : १. समजतोस, २. संपूर्ण, ३. प्रसिद्ध.

साह्य होवोनि श्रीरामासी। निवटोनियां लंकेशासी। संरक्षावें निजभक्तांसी। बंदिमोचनासी करवोनी॥२३॥ राम वधीना रावण। तैं बंदिमोचन करी कोण। कष्टताती सुरगण। त्यांचें स्थापन करावें॥२४॥ ऐसी भाकितां करुणा। कळों सरली रघुनंदना। देवांचा देव रामराणा। सुखी सुरगणा करीतसे॥२५॥ राम रणरंगधीर। सुखी करावया सुरवर। हातीं धरोनि धनुष्यशर। वधावया दशशिर तिष्ठत॥२६॥

आत्माराम व अहंरावण युद्ध, श्रीराम युद्धार्थ सिद्ध : विचित्र शस्त्रें विदग्धें[1]। रावण हाणी निजमदें। राम छेदील निमेषार्धे। श्रोते आनंदें परिसोत॥२७॥ आत्माराम अहंरावण। दोघांचें युद्ध अति दारुण। अंतरक्रियेचें विंदान। सावधान परिसावें॥२८॥ महामायेचें करोनि लाघव। बंदी घातले इंद्रादिदेव। सेवा घेतसे अपूर्व। नित्य विषय भरडणें॥२९॥ सेविलेंचि पुनःपुनः जाण। अहर्निशीं विषयसेवन। दळिलेंचि पिष्टपेषण। निजबळें जाण करवित॥३०॥ काल भोगिलें ज्या विषयासी। सवेंचि आज आणावी त्यासी। उसंत नाहीं अहर्निशीं। उबग चित्तासीं उपजेना॥३१॥ दशेंद्रियें अलोलिक। तेंचि रावणाचें दशमुख। केव्हांही न पवे तृप्तिसुख। जरी त्रैलोक्य चघळिलें॥३२॥ विचित्र वानसेचें जुंबाड। तेचि अनावर बाहुदंड। कवळितां सगळें ब्रह्मांड। न पुरे कोड दशमुखा॥३३॥ उघडी ममतेची दांताळी। चाटीत लोभाची अवाळीं। विकल्पाचे चाकळे[2] चघळी। सदा काळीं समसमित॥३४॥ ओढोनि कामाचा मेढा[3]। संकल्पबाण धडपुढा। विंधावया रावण गाढा। श्रीरामापुढां चालिला॥३५॥ निजहितीं कळवळा पूर्ण। ज्यांसीं अत्यंत असेल जाण। त्यांहीं सर्वांगाचे कान। करूनि श्रवण करावें॥३६॥ श्रीरामरावणांचें रण। वदावया मज कैंचे वदन।अंग पंगु मुकें दीन। अर्थज्ञान मज कैंचें॥३७॥ ऐसिया मज अनाथासी। जनार्दनें निजावेशीं। आज्ञापिलें अति प्रीतीसीं निजगुणासी गावया॥३८॥

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्। यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम्॥१॥

त्या अतुलनीय युद्धाचे वर्णनः भगवंताची कृपा घडे। तैं पांगुळही पर्वत चढे। मुकियासी वाचा जोडे। बाले होडें[4] बृहस्पतीसीं॥३९॥ उपनिषदांचा मथितार्थ। त्याच्या जिव्हाग्रीं नित्य नाचत। वेद वोसंगा[5] रिघत। सावचित्त वाचेसीं॥४०॥ राजांक लागे जियेसीं। राजपदीं चढे ते दासी। राजवर्गी मानिती तिसी। समर्थाची ऐसी निजकृपा॥४१॥ जनार्दनें तैसें केलें। रंक रजपदीं बैसविलें। रामचरित्र बोलविलें। मधुर बोलें मजकरवीं॥४२॥ मजमाजी प्रवेशोन। माझे वदनीं घालोनि वदन। वक्ता एक जनार्दन। रसाळ रामायण वदवीत॥४३॥ माझें जें कां मीपण। साचार एका जनार्दन। तेणें निजसामर्थ्येंकरोन। निजनिरूपण चालत॥४४॥ चतुराची कळा ऐसी। केवळ कोरड्या काष्ठासी। जवळी घेवोनि प्रीतींसीं। युक्तिविशेषीं कमावित[6]॥४५॥ तंति[7] लावोनि अद्भुत। रागोद्धार करी त्यांत। सज्जनांते रिझवित। ते कळा निश्चित कर्त्याची॥४६॥ ऐकतां चतुर्विध जन। सकळ पावती समाधान। हें काष्ठसामर्थ्य नव्हे जाण। कळा संपूर्ण कर्त्याची॥४७॥ त्या यंत्राचे परी जाण। माझेनि वदने स्वयें आपण। वक्ता एक जनार्दन। श्रीरामगुण गातसे॥४८॥ निजवैभव प्रकाशावयासी। मजहातें लिहविलें ग्रंथासी। संबंध नाहीं मजसीं। जेंवी साईखड्यासी[8] सूत्रधार॥४९॥ असो आतां परिहारता[9]। परिहार नावडे श्रीगुरुनाथा। स्वयेंचि कर्ता करविता। या बोलाचाही वक्ता श्रीगुरु॥५०॥

अतींद्रियता : पुढें रामरावणवृत्तांत। विषयाचा मेढा लंकानाथ। ओढी काढोनि उपरमत[10]। श्रीरघुनाथ विंधावया॥५१॥ विचित्र संकल्पाचें अनुसंधान। परिसा त्याचेंही लक्षण।

---

शब्दार्थ : १. तीक्ष्ण, २. घास, ३. धनुष्य, ४. प्रतिज्ञेने, ५. अंकी, मांडीवर, ६. उपयोगात आणतात, ७. तारा, ८. बाहुल्याला, ९. स्तुती, १०. सुखावतो.

ममताभाली अति दारुण। बळें रावण वर्षला॥५२॥ तें देखोनि रघुपती। बाण सोडिला शूरवृत्ती। तेणें ममतेची केली शांती। तेही स्थिती अवधारा॥५३॥ जरी असावें दुर्जेपण। ममता त्यासी करी कंदन। चराचरीं रघुनंदन। ममता पूर्ण निमाली॥५४॥ ममतेच्या निजशरीरीं। राम व्यापक बाह्यांतरीं। तेणेंचि जाहली बोहरी। धनुष्य करीं छेदिलें॥५५॥ दुर्जेपणाच्या निजनेटीं। सबळ रावणाची धनुर्वटी। विवेकाची आगी मोठी। धनुष्य मुष्टीचें जाळिलें॥५६॥ भेटी होतां विवेकममतेसीं। वैराग्यभडका वेगेंसीं। उठिला तेणें आवेशीं। विषयधनुष्यासी जाळिलें॥५७॥ निर्वाणींचें विषयधनुष्य। जळतां दुःख रावणास। घालोनियां श्वासोच्छ्वास। उद्विग्नमानस स्वयें झाला॥५८॥ विशेष धनुष्याची सामग्री। संग्रहिली होती भारी। त्याची सांडी झाली पुरी। निःशेष करी श्रीराम॥५९॥ आतां कायसी रथगती। म्हणोनि झाला पदाती। सक्रोध भाला घेवोनि हातीं। स्वयें रघुपती हाणों आला॥६०॥ निजरथा मागें सांडोन। पायीं धांवोनि रावण। लक्षोनियां रघुनंदन। हाणी दारुण धगधगित॥६१॥ तें देखोनियां जाण। डळमळीना रघुनंदन। सबाह्य शांतीचें कल्याण। क्रोधाचरण तेथें न चले॥६२॥ आधीं सहजचि रघुनाथा। सबाह्य शांतीचा परिघ[१] होता। तेणें क्रोधा प्राणांतव्यथा। निजसत्ता विसरला॥६३॥ अप्राप्तकामें[२] क्रोध उठी। श्रीरामातें पाहतां दृष्टीं। अप्राप्तीची कायसी गोष्टी। पूर्णकाम सृष्टीं राम॥६४॥ श्रीरामाचें स्मरतां नाम। दृष्टी वोळंगती सकळ काम। भक्तकामकल्पद्रुम। तो क्रोधा श्रीराम केवी साधे॥६५॥ देखतां श्रीरामाची मूर्ती। अप्राप्तता निमाली निश्चितीं। झाली क्रोधाची उपशांती। लंकापती थोंटावला[३]॥६६॥ तेणें आवेश दशशिरीं। मग प्रपंचकोशाभीतरीं। निजांगीं होती कामना सुरी। तिखट भारी आशाधार॥६७॥ तेणें आवेश दशशिरीं जाण। रघुनंदन सोडी नैराश्याचा बाण। तेणें आशासुरी उठविली जाण। कामना संपूर्ण निवटिली॥६८॥ सर्वेंचि रावण अत्युग्र। अविद्येचें निजशास्त्र। सोडिलें वासनेचें वज्र। श्रीरघुवीर दंडावया॥६९॥ श्रीराम धनुर्धारी नेटक। वज्र निवटावया देख। निर्वासनेचा तोमर चोख। एकाएक सोडिला॥७०॥ राम धनुर्वाडा विचित्र। वज्रावरी योजिला तोमर। तेणें भेदोनि सत्वर। केला दशवक्त्र तटस्थ॥७१॥ अंतर्बाह्य दोन्ही रणें। केली दारुण रावणें। तितुकीं निरसिली रघुनंदनें। अर्धक्षणें करोनियां॥७२॥ बाह्यरण शस्त्रास्त्रीं। कामक्रोधादिक अंतरीं। सामर्थ्य होतें दशशिरीं। रामें क्षणमात्रें उडविलें॥७३॥ द्वेषबुद्धि रावण। करितां श्रीरामाचें ध्यान। अंतर क्षाळलें संपूर्ण। झाली बोळवण कामक्रोधां॥७४॥ शुद्धांतःकरणें रावण। निंदेचे मिषें जाण। स्तविता झाला रघुनंदन। श्रोते सावधान परिसोत॥७५॥ लौकिक योद्धे रणाप्रती। सरल्या शस्त्रास्त्रसंपत्ती। तोंडबळे बडबडती। वल्गैजती[४] इतस्ततां[५]॥७६॥

रावणाची प्रतिक्रिया व त्या दृष्टीने रामास आव्हान : साधावया मोक्षश्री। रावणा अवस्था भारी। निंदेमाजी स्तवन करी। निजगजरीं अति[६] वोजा॥७७॥ रावण अत्यंत विचक्षण। वरी वेदशास्त्रसंपन्न। करिता झाला वर्णन। रघुनंदनस्वरूप॥७८॥ सूक्ष्मयुक्तिकुशळतेसीं। सोडोनियां वाच्यांशासी[७]। अंगीकारोनि लक्ष्यांशासी[८]। श्रीरामासी बोलत॥७९॥ आधीं त्वंपद तो रावण। तें शोधोनियां जाण। आतां तत्पद श्रीरामाचें पूर्ण। स्वरूपवर्णन करीतसे॥८०॥ तत्पद आत्मारामीं जाण। शुद्ध श्रीरामाचें वर्णन। सूक्ष्म सर्वगत सनातन। पावावया जाण गर्जत॥८१॥ निंदेचेनि मिषें जाण। शुद्ध श्रीरामाचें वर्णन। सूक्ष्म सर्वगत सनातन। स्वयें रावण अनुवादे॥८२॥ रावण म्हणे श्रीरामासी। किती आतां कपट करिसी।

शब्दार्थ : १. वेष्टण, २. इच्छा तृप्त न झाल्याने, ३. कुंठित झाला. ४. बडबडतात. ५. हवे तसे, ६. उत्तम रीतीने, ७. शब्दापासून होणाऱ्या अर्थावबोधास, ८. गर्भितार्थाला.

ठकोनि मारिलें वाळीसी। तैसें मजसीं चालेना॥८३॥ आणिक किती सांगों आतां। तुवां पूर्वीं ठकविलें बहुतां। कोण म्हणोनि होसी पुसता। तेंही तत्वतां सांगेन॥८४॥ तुज धरोनियां मानसीं। बहुत निघालें साधावयासी। शेखीं ठकवोनि तयांसी। दृश्य नव्हेसी सर्वथा॥८५॥ लपोनि त्यांच्या सर्वांगीं। सर्वथा न दिससी जगीं। शिणतां साधनीं अनेगीं। तोंड वेगीं न दाविसी॥८६॥ कपटविद्या करोनि गाढी। तीमाजी देसी बुडी। वेडा लाविलीं बापुडीं। वाळोनि कर्वडीं[१] पैं केलीं॥८७॥ चौघी देवोनि श्रीरामा। आपणा म्हणविसी आत्मा। छळून घेसी भजनधर्मा। अति दुर्गमा साधनीं॥८८॥ तुजलागीं मंत्र घेती। असंख्य पुरश्चरणें करिती। शेखीं तेही छळिलें निश्चितीं। निजात्मप्राप्ती चुकविली॥८९॥ तें मजसीं न चले मत। मी जाणतसें समस्त। मंत्रामाजी जो मंत्रार्थ। तो तूं निश्चित श्रीरामा॥९०॥ मंत्रमंत्रामाजी अक्षर। ॐनमो इत्यादि उच्चार। अक्षरीं अक्षर तूं रघुवीर। हें मी साचार जाणत॥९१॥ पाठकें छळोनियां जाण। साधनीं लाविलें वेदपठण। कोरडी वाचेची ठणठण। लावूनि पूर्ण गोंविलें॥९२॥ करितां दशग्रंथपठण। तेथेंचि छळिले संपूर्ण। उदात्त अनुदात्त स्वरित जाण। वाद विचक्षण घालिती॥९३॥ ऐसें ठकवोनियां तयांसी। बापुडीं वेडा लाविलींसी। तैसें न चले मजसीं। तुझे लपणीसी[२] जाणत॥९४॥ वेदमूळ तो ॐकार। तेथें तुझी लपणी थोर। अकार उकार मकार। त्रिमात्रा स्वर त्रिगुणातीत॥९५॥ ऐसे पाठक ठकविले। तैसेचि पंडित नाडिले। बापुडियां कांही न कळे। गोंवून घातले विवादीं॥९६॥ शास्त्रश्रवण साधन शुद्ध। त्यासही छळिलें प्रसिद्ध। केले अभिमानाचे विरुद्ध। बहुविध बहुयुक्तीचे॥९७॥ मजसीं न चले तें विंदान। मी जाणतसें संपूर्ण। शास्त्रांमाजील जाणपण। लपणी जाण तें तुझी॥९८॥ तेही घातले आडवाटा। चढला जाणपणाचा ताठा। तेणें न मनीं पैं वरिष्ठा। फुगारा मोठा गर्वाचा॥९९॥ पंडितां न कळे हे स्थिती। शास्त्रांमाजी जे जे युक्ती। जाणिवा तेथें तुझी वसती। हे सांगती आणिका॥१००॥ जेंवी गूळउंसाचा घाणा। मुखींचा रस भरे भाणा। शव्दसोपटीं आपण जाणा। रितेपणा करकरी॥१॥ शास्त्रांमाजी जे जे युक्ती। ते ते केवळ चैतन्यस्फूर्ती। तेही वंचोनि तयांप्रती। अहंमती भुलविलें॥२॥ भोळीं बापुडीं याज्ञिकें। यज्ञद्वारा भरलीं एकें। त्यांसी गोंविलें कौतुकें। स्वर्गसुखे दावोनियां॥३॥ कुंड साधिती अति व्युत्पत्ती। मेखळा परिमित साधिती। वेदी साधिती अति निगुतीं। मंडपप्रीतीकरोनियां॥४॥ इध्मा बर्हि त्रिसंधान। विचित्र दर्भांचें परिस्तरण। त्याहीवरी पात्रासादन। युक्ति करोन मंडित॥५॥ आणिती ओषधिसंभार। होमद्रव्य अति विचित्र। मेषश्येनादि परिकर। आणिती सत्वर यागासीं॥६॥ अति युक्ति साधूनि अरणी[३]। मंथन करिती कष्टेंकरोनी। तेथें प्रकटला जो अग्नी। तो कुंडीं आणोनी स्थापिती॥७॥ तथे ॐकार वषट्कार। मंत्रघोषाचे उच्चार। ऋत्विज करिती अपार। स्वाहास्वधाकारविनियोगें॥८॥ होते[४] पोते[४] उद्गाते[४]। सुस्नात सावधचित्ते। आज्ञा पुसोनि यजमानातें। अवदानातें अर्पिती॥९॥ न मम म्हणतां यजमान। ऋत्विज सोडिती अवदान। तेणें बळें याज्ञिक जन। स्वर्गभुवन वांछिती॥११०॥ पुण्यक्षयें तेथून पडती। परी नैश्वर्य न मानिती। ऐसी ठकलीं नेणों किती। तें मजप्रती चालेना॥११॥

**अहंयज्ञ व रावणाची गर्जना :** तेथील लपणीचें सूत्र। मी जाणतसें समग्र। कर्माकर्मीं सूक्ष्म सार। स्वरूपें साचार लपतोसी॥१२॥ अग्नि आज्य[५] समिधा समग्र। कर्माकर्मीं सूक्ष्म तूं साचार। याज्ञिकां न कळे हे सूत्र। कर्मठपणे फार व्यापिले॥१३॥ यजमानाच्या क्रियाशक्ती। तेचि तुझी निजस्थिती। संन्यासीही त्याच रीतीं। छळणोक्तीं नाडिले॥१४॥ विरजाहोम[६]

शब्दार्थ : १. मढी, २. लपण्याला, ३. अग्नी उत्पन्न करण्याचे काष्ठ, ४. ऋत्विज, ५. तूप, ६. संन्याससमयीचा होम.

करोनि एक। जाळिले म्हणती कामादिक। शेखीं तिळतांदूळ जाळिले देख। कामक्रोधादिक अनसूट ॥१५॥ गुरूपासोनि महावाक्य। ज्याकारणें घेतलें देख। तें राहिलें सकळिक। पूज्यत्वें चोख भुलविलें॥१६॥ आम्ही पूज्य परमहंस। म्हणोनि भुलविलें त्यांस। विरले महावाक्यास। पंचीकरणास विसरले॥१७॥ सांडोनि स्वानंदस्फूर्ती। पूज्यत्वें भुलविले यती। तैसेंचि केले योग्यांप्रती। सांगूं किती कपटकर्म॥१८॥ एक ते पैं बापुडीं। तुज पहावया लवडसवडी। निघाले अति तांतडीं। ते घातले कडाडीं योगाचिये॥१९॥ वारियावरी घालिसी। नाना सिद्धींसीं गोंविसी। ऐसा ठकवोनियां लपसी। वेडा लाविसी योगियां॥१२०॥ मग काढितां कडाडी। चढसी वैकुंठीचिया पहाडीं। नातरी शेषफडेबुडीं। निद्रामीषें लपतोसी॥२१॥ तेथोनि काढितां निर्धारीं। भेणें लपसी दशावतारीं। रूप धरितां सिंहशूकरीं। लाज निर्धारीं तुज नाहीं॥२२॥ साधितां[1] न साधसी बहुतां। तो मज सांपडलासी आतां। झणें होसी तूं दुश्चिता। येथोनि आतां ढळों नेदीं॥२३॥ ऐसा सिंहनादें रावण। गर्जता झाला आपण। तंव सारथि अति विचक्षण। तेणें विंदान साधिलें॥२४॥ राम धनुष्य तोडितां जाण। सोहं भावाचा मेढा कठिण। ठेविला होता आच्छादून। तो आणोन दीधला॥२५॥ हातीं पडतां धनुष्यबाण। निष्कपट रणांगण। साधावया वीर रावण। काय आपण बोलत॥२६॥ श्रीरामें रणख्याती। करोनि सकळां दिधली मुक्ती। उरले जे तयांप्रती। लंकापति अनुवादे ॥२७॥ आजीवरी म्यां केलें कपट। रामें त्याचें केले सपाट। आतां झालों मी चोखट। दशकंठ अति शुद्ध॥२८॥ सकळ सैन्यासमवेत। युद्धीं नाटोपे रघुनाथ। तो मी एकांगी लंकानाथ। राम निश्चित साधीन॥२९॥ करोनि लोटांगण तुम्हांसी। विनवितों मी सकळांसी। जो खड्गातें हातवशी। तेणें शिव पूजेसीं भेदिलें॥१३०॥ तुम्हांसी शंकराची आण। कोणीं न करावें युद्धत्राण। साक्षी होवोनि आपण। आंगवण पहावी॥३१॥ श्रीराम आणि रावण रणीं। युद्धीं भिडती निर्वाणबाणीं। जय अपजय दोन्ही। कोण कोणालागूनी पैं होतो॥३२॥ ऐसी सकळां विनवण। करितां झाला रावण। तें ऐकोनि रघुनंदन। स्वसैन्यालागून विनवित॥३३॥ रावणाच्या निजमानसीं। बहुत दिवसें आधी[2] ऐसी। समरांगणीं श्रीरामासीं। निजांगेंसीं भिडावें॥३४॥ ते रावणाचे मनोरथ। आजि फळले समस्त। रणीं भेटलों मी रघुनाथ। तेणें बहुत हरिखेल॥३५॥ माझ्याही हेंचि मानसीं। रावणाच्या मनोरथासी। सिद्धि पाववीन रणभूमीसीं। मुक्ति रावणासी देऊनी॥३६॥ यालागीं तुम्हीं समस्त। युद्धीं व्हावें निवांत। राम आणि लंकानाथ। कैसे रणांत भिडतील॥३७॥ साक्षी होवोनियां तुम्हीं। पहावी दोघांची रणभूमी। जाणोनि रिघे जो संग्रामी। आणि दुर्गमी तयासी॥३८॥ जाणोनि निघेल युद्धासीं। अदंडें दंडीन मी त्यासी। ऐसें बोलतां राघवासी। कांप सकळांसी पैं आला॥३९॥ वेदतुल्य तुझी आज्ञा। कोण करूं शके अवज्ञा। लागले श्रीरामचरणां। तुझी वंद्य आज्ञा आम्हांसी॥१४०॥ तंव रावण अति कडाडीं। गर्जोनियां हाक फोडी। बाण काढोनियां तांतडी[3]। राम निर्वडी[4] विंधूं पाहे॥४१॥ परम प्रीति लंकानाथा। रणीं श्रीरामासीं भिडतां। कोण बाणली अवस्था। सावध श्रोतां परिसावी॥४२॥ भेदोनियां ब्रह्मांडासी। विश्वात्मक श्रीरामासी। देखतां रावण हर्षासीं। निजधर्मासी विसरला॥४३॥ एका जनार्दना शरण। श्रीरामासीं करितां रण। स्वयें विसरोनि रावणपण। श्रीराम आपण होईल॥१४४॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रामरावणयुद्धप्रसंगो नाम एकषष्टितमोऽध्यायः॥६१॥ ओंव्या ॥१४४॥ श्लोक॥१॥ एवं ॥१४५॥

---

**शब्दार्थ :** १. मिळवू जाता, २. मनोव्यथा, ३. सत्वर, ४. खरेपणाने.

# अध्याय बासष्टावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## रावणाचा शिरच्छेद

रावणाची स्थिती व श्रीरामस्वरूपावलोकन : सोहंभावाचा मेढा सुलक्षण। अनुसंधानाचा तीक्ष्ण बाण। लक्षूनियां रघुनंदन। स्वयें रावण विंधो पाहे॥१॥ तंव अवघा ब्रह्मांडगोळ। रामें व्यापिला दिसे सकळ । तेथें कायसें जगतीतळ। रामें प्रबळ वाढिन्नला॥२॥ सप्त-पाताळातळीं चरण। श्रीरामाचे देखे रावण। ऐका तयाचें लक्षण। सुलक्षण सुचिन्हीं॥३॥ निजधैर्यशेषफडीवरी। श्रीरामचरण निर्धारीं। सुचिन्हें शोभती कवणेपरी। नवलपरी तेथींची ॥४॥ अनुपम चरणपंकज[१]। शोभे सायुज्याचा ध्वज। उर्ध्वरेखा ते सहज। दावी वोज[२] ऊर्ध्वगतीची॥५॥ वज्र आणि अंकुश दोन्ही। भक्तसाह्यालागोनी। विपक्षीं[३] अंकुश ओढोनी। भक्तरक्षणीं छेदी वज्रें॥६॥ अनंतसूर्यांचीं किरणें। जैसीं मिरवती बाळपणें। त्यांतें आणोनियां उणें। अधिकगुणें चरणतळा॥७॥ जैशा नभाचिया कळिका। तैसी शोभा अंगुळिका। शोभताती अलोलिका। रसातळलोकापर्यंत॥८॥ नखचंद्री चंद्ररेखा। रमा रातली[४] चरणपीयुखा[५]। गंगेचें तें माहेर देखा। सकळ लोकां उद्धरी॥९॥ कैशी घोंटियांची बरव[६]। हे तंव निर्गुणाचे अवयव। वरी कळावियांची ठेव। सागरीं अपूर्व श्यामलहरी॥१०॥ तळातळ लोक जाण। तेणें वसविलें संपूर्ण। वांकीतोडरांचें महिमान। वर्णावया वदन मज कैंचें॥११॥ यमनियमांच्या कुसरीं[७]। मनें मुरडिली माघारीं। जे सोहंभावाच्या गजरीं। वांकी निर्धारीं गर्जत॥१२॥ भवस्वर्गा प्रळयकाळ। नामें प्रळयघंघाळ। तोडर गर्जोन केवळ। सांगे प्रबळ सायुज्यदान॥१३॥ सूर्यबिंबामाजी प्रभा। तैसी जानुचक्रीं शोभा। महातळींचा तो गाभा। दिसे उभा शोभत॥१४॥ ऊरूंची शोभा अद्भुत। सुतळलोक जेथें नांदत। बळिराजा नित्यांकित। राज्य करित पैं तेथें॥१५॥ बळि चरणाचा अनुरक्त। केंवी राहिला सुतळांत। त्या बळीचा निश्चितार्थ। ऐका सुनिश्चित सांगेन॥१६॥ ऊर्ध्वलोका देवोनि लात। अधोवदनें नित्यव्रत। सुतळीं राहोनि निवांत। चरण चिंतित रामाचे॥१७॥ राहोनियां मध्यालोकीं। श्रीरामातें अवलोकी। सांडोनियां अधऊर्ध्वाची उखी[८]। मेळवित एकीं श्रीरामीं॥१८॥ कटिप्रदेशीं वितळलोक। विस्तारला एकाएक। पाहतां तेथींचा आलोक[९]। लोकालोक हारपे॥१९॥ सर्वांमाजी तोचि मध्य। शोभा शोभे विद्गद। अतळलोक प्रसिद्ध। तये स्थानीं नांदत॥२०॥ विजु देखोनि श्रीरामासी। विसरली उदयास्तांसी। झाली पीतांबर कासेसीं। माळ कंठींसीं मिरवत॥२१॥ श्रीराम आकळें[१०] सगळा। तेच भक्त भावार्थमेखळा। उपनिषदांचा पाळा। येवोनि रिघाला किंकिणींमाजी॥२२॥ चिद्ररत्नें कटिसूत्रकटीं। उपरी मिरवे माळगांठी। अनुहताच्या निजनेटीं। ध्वनि गोमटी क्षुद्रघंटा॥२३॥ झालिया स्वस्वरूपीं भेटी। जेंवी वृत्ति होय उफराटी। सांडोनियां मत्तचावटी। अधोदृष्टी सलज्ज॥२४॥ तेंवी अधोमुख घंटिका। पालवीं मुक्तलग[११] नेटका। कांसे लागलिया देखा। मुक्ति सकळिकां देत राम॥२५॥ उदर म्हणती दामोदर। परी तें जगदुदर साचार। त्रिलोकत्रिवळी सुंदर। वरी मनोहर रोमरेखा॥२६॥ अनंतब्रह्मांडसाटोवा[१२]। कीं विश्रांति सकळ जीवां। म्हणोनि दामोदर या नांवा। मिरवावया ख्याति झाली॥२७॥ नाभि सखोल निर्मळ। रजोरागें रातोत्पळ। सृष्टिकर्त्याचें केवळ। जन्म प्रबळ तये स्थानीं॥२८॥ भूलोकांचें अधिष्ठान। उदर श्रीरामाचें

शब्दार्थ : १. पदकमळ, २. तेज, ३. शत्रूवर, ४. रममाण झाली, ५. चरणामृताला, ६. सौंदर्य, ७. कौशल्याने, ८. विवेक, ९. प्रकाश, १०. सापडे, ११. मोत्याचा घोस, १२. अनंतब्रह्मांडांना आश्रयभूत.

पूर्ण। तळीं सप्तपाताळें संपूर्ण। ऊर्ध्वलोकाचें रचन त्यावरी ॥२९॥ हृदय शुद्ध अव्यंग। संकल्पविकल्पातीत सांग। तेथें रंगले अंतरंग। अति सभाग्य साधुजन ॥३०॥ दक्षिणांगीं विप्रपादेंकरीं। आपुल्या महिम्याची थोरी। वाढविली प्रीतीकरीं। लात उरावरी साहोनी ॥३१॥ केवळ सुखाचेंही सुख। गुणग्रंथिरहित देख। साधूनि रत्नजडित पदक। अलोलिक शोभत ॥३२॥ सोलींव सुखाचें निजसार। श्रीरामहृदयावरी पदकहार। सत्वगुणीं अति सुंदर। श्रीरघुवीर शोभत ॥३३॥ भक्तिवैराग्यशुद्धिसंपुटीं। मुक्तमोतियें जन्मलीं गोमटीं। तेंवी श्रीरामाचिये कंठी। वैजयंती गोमटी सुरेखा ॥३४॥ चिंतात्यागें निर्मळ वृत्ती। तेचि अम्लान माळा शोभती। भूर्लोकाची तेथें वसती। लंकापति देखत ॥३५॥ अष्टपत्री निर्मळ। अंतरीं विकसित कमळ। अनन्यगतीच्या दृष्टि बहळ[1]। तुळसीदळमंडित ॥३६॥ सप्तावरणांहून उदंड। अति दीर्घ बाहुदंड। तन्मयाचें मिरवे कोदंड। अति प्रचंड साजिरें ॥३७॥ दुजे करीं निर्वाण। चहू पुरुषार्थांचे बाण। देहअहंकृति रावण। वधावया जाण धरियेले ॥३८॥ दोहीं हातीं परिकर[2]। दोन्हीं आयुधें विचित्र। दशेंद्रियें दशवक्त्र। निवटावया सत्वर धरिलींसे ॥३९॥ ओंकार तोचि कंबुकुंठ[3]। मात्रात्रयाचें[4] मूळपीठ। वेद तेथोनि प्रकट। झाला उद्भट त्रिकांडी ॥४०॥ तें महर्लोकरचन। रचिता झाला रघुनंदन। त्याचे श्रवणाचें महिमान। दशानन विवंची ॥४१॥ समूळ चैतन्याचें आळें। तैसे रामाचे विशाळ डोळे। मनोगतें पैं सकळें। एके काळीं देखणें सदा ॥४२॥ पूर्वोत्तरमीमांसा दोन्ही। अहर्निशीं भजती भजनीं। म्हणोनियां श्रीरामश्रवणीं। कुंडालालागूनि अधिकारु ॥४३॥ श्रीराम लेणियांचें लेणें। विश्व मुक्त त्याचेनि श्रवणें। श्रवणेंचि देखिला रावणें। नारदवचनेंकरोनी ॥४४॥ आनंदविश्रांतीस आलें। कीं निवोनि सुख मुसावलें[5]। तेंचि साचार शोभलें। वदनबिंब निमासुर ॥४५॥ त्या आनंदसागराचे तरंग। तेचि दशन[6] सुरंग। अधरीं उभय दिसे योग। जीवशिवभाग एकत्र ॥४६॥ श्रीरामाचें प्रसन्न वदन। तेथें जनांसी विश्रांति गहन। म्हणोनि स्वर्गादिकस्थ जन। करिती ध्यान रामाचे ॥४७॥ निजनैराश्यपरिकर। एकनिष्ठता मुनिवर। कां अविच्छिन्न[7] तैलधार। तैसें नासिक सुंदर श्रीराममुखीं ॥४८॥ समूळ चैतन्याचें आळें। तैसे रामाचे विशाळ डोळे। श्रवणांत पैं सकळे। एके काळें देखणे सदा ॥४९॥ रवि शशी निरंतर। तेजें झाले प्रकाशकर। तेचि सेविती स्वतंत्र। श्रीरामनेत्र होउनी ॥५०॥ निजात्मबुद्धिउल्लासें। तपें केलीं खरपुसें[8]। म्हणोनि नेत्राचेनि प्रकाशें। वसे सावकाशें तपोलोक ॥५१॥ श्रवणांत अति दीर्घता। द्वैतदृष्टी पैं होतां। न ये पाहतां सर्वथा। अतर्क्यता स्वभाव ज्याचा ॥५२॥ नवल तेथींचें निरीक्षण। करीत कामासीं कामन। डोळया डोळेमोहन। आवडीं जाण पडतसे ॥५३॥ जेंवी गगनोदरीं धनुष्यरेखा। तैशा भोंवया सुरेखा। कीं वदनेंदुचिया पीयूखा। सेविती आर्त चकोर ॥५४॥ जैसें अधिष्ठान निर्मळ। तैसें विस्तीर्ण कपाळ। अखंड न खंडे त्रिकाळ। त्रिवळी प्रबळ तेचि निढळीं[9] ॥५५॥ संकल्पमृग वधिला लोभी। काढिला सोहंमृगनाभी। तोही अर्पिला पद्मनाभीं। निरालंबी मळवट ॥५६॥ स्वस्वरूपें प्रबळ। सबाह्याभ्यंतर निर्मळ। पावोनियां श्रीरामभाळ। वसती सकळ सत्यलोकीं ॥५७॥ नभ शून्यत्वा उबगलें। तें श्रीरामा शरण आलें। येवोनि मस्तकीं राहिलें। नीळालकीं शोभत[10] ॥५८॥ गजेंद्रदंताची भक्तिफणी। स्वभावें मस्तकीं धरोनी। तियें कुरळ केश विंचरोनी। वीरगुंठी दाटिली ॥५९॥ वरी शुद्ध मनाचीं सुमनें। गुंफोनि अनुसंधानें। सुवासितें चैतन्यपणें। बांधितां ठेंगणें नभरामा ॥६०॥ वानूं मुकुटाचा महिमा। कैंची उपमा निरुपमा। तेणें रचना मनोरमा। वैकुंठा आणि कैलासा ॥६१॥ ऐसें

**शब्दार्थ :** १. पुष्कळ, २. सुंदर, ३. शंखाकृती गळा, ४. आकार, उकार, मकारांचे, ५. एकत्र झाले, ६. दात, ७. एकसारखी, ८. पूर्ण, ९. कपाली, १०. निळ्या केशांनी.

चतुदर्शभुवन। वैकुंठकैलासादिकरून। प्रकाशिता रघुनंदन। देखोनि रावण तटस्थ॥६२॥ अपरिमित चौपासीं। देखोनियां श्रीरामासी। रावण चढला आवर्शी। बाण सीतार्सी[1] लाविला॥६३॥ समरांगणीं निजकडार्डी। बाण ओढोनि कानाडी। निजाभिमानें हाक फोडी। लक्ष निर्वडी भेदावया॥६४॥ अनंतब्रह्मांडांचिया पंक्ती। ज्याचे कडवसां[2] भासती। तो विंधावया रघुपती। लंकापति लक्ष्य पाहे॥६५॥ तंव पिरीत झालें तेथें। स्थूळ सूक्ष्म जितुकीं भूतें। वेगळालीं पैं समस्ते। राम निश्चित देखतसे॥६६॥ वानरसैन्याभीतरी। राम विंधावया बाणेंकरी। पाहता झाला दशशिरी। तंव प्रतिशरीरीं श्रीराम॥६७॥ गजाकडे जंव पाहत। तंव महावता सहित। गज देखिला रघुनाथ। सर्वेचि पाहत रथाकडे॥६८॥

रावणाला सर्वत्र रामसाक्षात्कारः तंव रथवारूसहित। सारथिशस्त्रास्त्रांसमवेत। ध्वजापताका मंडित। देखे लंकानाथ श्रीराम॥६९॥ सपर्वत वानरभार। द्रुम पाषाण परिकर[3]। पृथक् पृथक् रघुवीर। दशवक्त्र देखत॥७०॥ सौमित्र बिभीषण तेथ। सुग्रीव अंगद जांबवंत। तार तरळादि समस्त। हनुम्यासहित श्रीराम॥७१॥ निजसेनेचे राक्षस। रणयोद्धे रणकर्कश। त्यांचा लोपोनि राक्षसभास। सावकाश राम झाले॥७२॥ फिरोनि पाहे लंकेकडे। रामरूप लंकेचे हुडे[4]। गुप्तद्वारें जीं अवघडें। गूढें निगूढें राम झाला॥७३॥ घरें चौबारें समस्त। महा सोपानें[5] अद्‌भुत। दुर्गाची सामग्री समस्त। राम निश्चित होवोनि ठेला॥७४॥ पाहतां यंत्रगोळांकडे[6]। यंत्रद्रव्य जें अवघडें। दुर्धर शस्त्रें जीं अति प्रचंडें। निजनिवाडें[7] राम झाला॥७५॥ आपला जो का निजरथ। वारुसारथिध्वजांसहित। स्वयें झाला रघुनाथ। अति विस्मित रावण॥७६॥ नेहटून[8] पाहे जंव आपण। तंव निजहस्तींचे धनुष्यबाण। तेंही झाला रघुनंदन। स्वयें रावण विस्मित॥७७॥ तळीं पृथ्वीकडे पाहे। तंव ती राम झाली आहे। जीवनाचीं रससोये। राम स्वयें होवोनि ठेला॥७८॥ तेजाचें जें निजतेज। तें रामचि स्वयें सहज। वायुचें जें चळणवोज[9]। चाळक सहज श्रीराम॥७९॥ श्रीराम न दिसे जेथें। नभ शून्यपणें भासे तेथें। देखिलिया श्रीरामातें। चिद्‌गगन तेथें राम झालें॥८०॥ पवनीं दहनीं[10] अवनीं गगनीं। रामावीण न दिसे नयनीं। ठेला त्रैलोक्य व्यापूनी। दशाननीं अति विस्मयो॥८१॥ सप्तपाताळांचें अंतर। ऊर्ध्व सप्तलोकांचे पदर। दिशांच्या पोकळीं समग्र। स्वयें रघुवीर कोंदला॥८२॥ निजदेह पाहे रावण। हस्तपादादि अवयव पूर्ण। तोही झाला रघुनंदन। रावणपण खचों पाहे॥८३॥ अस्थि चर्म मज्जा मांस। रामें भेदिलें सप्तकोश। अंतरीं करोनि प्रवेश। निजहृदयास शोधित॥८४॥ मनाचे संकल्प सर्व। स्वयें झाले पैं राघव। विसरोनि निजस्वभाव। उन्मनभाव बाणला॥८५॥ बुद्धि बोधेंसीं अवचितीं। राम झाली निश्चितीं। विसरोनि निजस्फूर्तीं। समाधिस्थिती बाणली॥८६॥ चित्तें चिंतितां रघुनंदन। स्वयें झाला चैतन्यघन। तेणें भयें अभिमान। निजचिन्हही विसरला॥८७॥ अहंकार कांपिन्नला। तो श्रीरामा शरण आला। तद्रूपतेचा कौल घेतला। सोहं झाला श्रीराम॥८८॥ अंतःकरणीं व्यापक धर्म। धरून होते प्रपंचधाम। तेणें देहें देखितां रघूत्तम। सर्वगत राम स्वयें झाले॥८९॥ कायसी सुवेळा निकुंभिळा। राम झाला बोरीबाभळा। दशकंठ भ्रमित झाला। पाहूं लागला दशदिशा॥९०॥ जिकडे पाहे तिकडे हरी। रावण पडला भ्रमचक्रीं। भ्रमतसे चक्राकारीं। राम निर्धारीं लक्षेना॥९१॥ येरीकडे रघुनंदन। तन्मयाचें कोदंड जाण। घेऊनि सायुज्यतेचा बाण। सीतीं पूर्ण सज्जिला॥९२॥

श्रीरामांच्या दोन हातांची स्थिती : पूर्ण कानाडी ओढोनि पाहीं। बाण सोडितां लवलाहीं। श्रीरामाच्या हस्तीं दोहीं। अपूर्व कांही वर्तलें॥९३॥

---

शब्दार्थ : १. धनुष्याचे दोरीवर, २. छायेमध्ये, ३. समग्र, ४. बुरुज. ५. पायऱ्या, ६. तोफांचे गोळे, ७. खरेपणाने, यथार्थतेने, ८. लक्षपूर्वक, ९. चलनशक्ती, १०. अग्नीमध्ये.

आकृष्टे युधि कार्मुके रघुपतेर्वामोऽब्रवीद्दक्षिणम् । पुण्ये कर्मणि भोजनेच भवतः प्रागल्भ्यमस्मिन्न किम्॥
वामान्यः पुरब्रवीत्तमपि रे पृच्छाम्यहं स्वामिनम्। छिंद्यां रावणमस्तकानि युगपच्चेकैकमादिश्यताम्॥१॥

श्रीरामाचें दोनी हस्त। परस्परें अनुवादत। तेणेंचि स्वामीचा पुरुषार्थ। हर्षे सांगत जगासी ॥९४॥ श्रीराम अति आवेशीं। बाण लावोनि सीतासीं। ओढिता दक्षिणहस्तासीं। गेला कानापासीं कानाडी॥९५॥ तंव वाम बोले दक्षिणाप्रती। युद्धी भिडतां रघुपती। मागें सरलासि युद्धख्याती। वीरवृत्ती हे नोव्हे॥९६॥ पुण्यकाळ देखोनियां पुढें। धांवोनि येसी लवडसवडें। दान करिसी वाडेंकोडें। श्रेय निवाडें घ्यावया॥९७॥ तैसाच सत्यकर्माच्या ठायीं। पुढें धांवसी लवलाहीं। भोजनाच्याही समयीं। कवळ पाहीं घ्यावया॥९८॥ जैसा तेथें पुढें होसी। तैसा आजि रणभूमींसीं। पुढे होवोनि वेगेंसीं। पुरुषार्थासी दाखवीं॥९९॥ जेणें बळें सत्कर्मासीं। पुढें होसी आवेशीं। तेणें बळें रणभूमीसी। पुरुषार्थासी दाखवीं॥१००॥ आजिवरी समग्र वित्त। स्वामींचें भोगिलें समस्त। युद्धसमयीं मागें सरत। हें अनुचित सर्वथा॥१॥ ऐकोनि वामाचें बोलणें। दक्षिण हांसिन्नला सत्राणें। निर्बळासी पुढें करणें। लाजिरवाणें आपणासी ॥२॥ धनुष्य देवोनि तुजप्रती। पुढें करितांचि काकुळती। येवोनि बोलिलासि छळणोक्ती। युद्धख्याती न करवे॥३॥ पुढें जावोनि काय केलें। रणीं थोटावलें[1] राहिलें। संधान न करवे वहिलें। वल्गैजलें[2] वृथाचि॥४॥ रणीं पाठी नाहीं दिधली। जे तूं बोलसी छळणबोलीं। वीरवृत्तीची तुवां भली। नाहीं देखिली युद्धरचना॥५॥ मागें सरोनि कानासीं। पुसतसें गुज स्वामीसीं। कैसें निवटूं रावणासी। हें मजपासीं सांगावें॥६॥ दहाही शिरें एकवट। कीं निवटूं वेगळाले कंठ। स्वामी सांगावें हें स्पष्ट। रावण दुष्ट वधावया॥७॥ तव नीचाचा ऐसाचि स्वभावो। की फाटकियांत शिरवावा पावो। तुवां पुढें जावोनि पहा हो। कोण आवो साधिला॥८॥ ऐसें निजहस्ताचें लाघव। ऐकोनि सुखावे रघुराव। तंव येरीकडे पहा हो। रावणें अपूर्व मांडिलें॥९॥ त्या दोघांचिया रणासीं। कैंचे सामर्थ्य उपमेसीं। त्याची उपमा साजे त्यासी। पैस[3] वैखरीसीं असेना॥११०॥

गगनं गगनाकारं सागरः सागरोपमः। रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव॥२॥

श्रीराम-रावणाचे युद्ध अनुपम : सगळें सांठवे गगन। ऐसें दुसरें कैचें आन। तैसें रामरावणांचें रण। उपमा समान त्याची त्यासी॥११॥ सागरासारिखा आन। दुजा सागर कैंचा भिन्न। म्हणोनि त्याचे उपमे समान। न दिसे चिन्ह आणिक॥१२॥ तैसें रामरावणांचे रण। त्यासीं उपमा रामरावण। म्हणोनि उपमेसीं पूर्ण। उपमावक्तेपण मज नाहीं॥१३॥

श्रीरामपूजनाबद्दल रावणाचा उल्लास : कोदंडपाणि रघुनाथ। गगनभरी लखलखित। देखोनियां लंकानाथ। हर्षितचित्त पैं झाला॥१४॥ जन्मजन्मांतरीं बहुतां। नाना साधनीं कष्टतां। भेटी झाली श्रीरघुनाथा। म्हणोनि तत्वतां पूजित॥१५॥ उभा रणांगणामाझारी। नाहीं पूजेची सामग्री। म्हणोनि रामातें बाणधारीं। रावण गजरीं पूजित॥१६॥ करोनि बाणांच्या अक्षता। त्यांहीं श्रीरामातें पूजितां। उल्लास रावणाच्या चित्ता। अति सादरता पूजेची॥१७॥

सर्व भूतांत सर्वत्र रावणाला श्रीरामांचा भास: पूजावया राघवेशा। रावण पाहे जंव आकाशा। तंव राम कोंदला दशदिशां। निजमानसा उल्लास॥१८॥ लक्षोनियां रघुनंदन। भलतेकडे टाकी बाण। नेणे स्वसैन्य परसैन्य। करी संधान अद्भुत॥१९॥ पुढें लक्षोनि रघुनंदन। जंव आवेशीं विंधी रावण। तंव पाठीसीं धनुष्यबाण। घेवोनि जाण उभा असे॥१२०॥ मागें विंधो जाय रावण। तंव वामांगी रघुनंदन। तिकडे करी जंव संधान। तंव दिसे दक्षिणांगीं॥२१॥ अधऊर्ध्वदिशा[4] समस्त। कोंदला देखोनि रघुनाथ। बाणीं सर्वत्र पूजित।

शब्दार्थ : १. स्तब्ध, २. बडबडले, ३. विस्तार, ४. खालीवर.

तेणें हांसत सुरसिद्ध ॥२२॥ राक्षस म्हणती रावण। भ्रमला अतिशयें दारुण। आम्हांसींच विंधितो बाण। रणकंदन मांडिलें ॥२३॥ राम राहिला एकीकडे। रावणेंचि निजनिवाडें। आमुचें काढियेलें मेढे[1]। कोणीकडे पळों आतां ॥२४॥ स्वर्गीं हांसती सुरगण। सिद्ध हांसती संपूर्ण। गणगंधर्वादि चारण। खदखदून हांसती ॥२५॥ वानर हांसती वाडेंकोडें। रावण रामें केले वेडें। आपुलें पारिखें[2] न दिसे पुढें। जिकडे तिकडे शरटाकी ॥२६॥ न कळे कोणासी मात। रावणाचें अनुचरित[3]। राम देखोनि सर्वगत। बाणीं पूजित अति प्रीतीं ॥२७॥ देखोनियां सर्वगत। भजे जो कां अनुरक्त। जन त्यासी म्हणती भ्रांत। अंतरवृत्त कळेना ॥२८॥ विपरीत ठसा जनाचा। अतिशयें गुंता प्रपंचाचा। त्यासी म्हणताती दैवाचा। ऐसा लोकांचा निजबोध ॥२९॥ जो उदास प्रपंचासीं। निर्दैवी करंटा म्हणती त्यासी। अंतर न कळे कोणासी। सांगतां त्यांसी पैं नये ॥१३०॥ गूळ गोड स्वभावतां। परी तो न माने सर्पग्रस्तां। अंतरीं ज्वरें व्यापिलें असतां। दुग्ध सर्वथा म्हणे कडू ॥३१॥ ऐसीच लौकिकाची स्थिती। न कळे हरिभक्तांची वृत्ती। सर्वत्र पूजितां रघुपती। भ्रम मानिती सकळिक ॥३२॥ रावणाची सर्वगतता। जाणोनियां रघुनाथा। कृपा उपजली चित्ता। होय सोडिता बाणातें ॥३३॥ बाह्य क्रोधाचें विंदान। अंतरीं कृपेचें आयतन[4]। जेंवी मातेचा कोप दारुण। करीत ताडन दोषत्यागा ॥३४॥ देहदोषें अहंरावण। बहुसाल पीडिला देखोन। निजकृपा कळवळोन। स्वस्वरूप जाण देऊं पाहे ॥३५॥

ततः क्रुद्धो महाबाहू रघुणां कीर्तिवर्धनः। संधाय धनुषा रामो बाणमाशीविषोपमम् ॥३॥
तेन तस्य शिरश्छिन्नं श्रीमज्ज्वलितकुंडलम्। तच्छिरः पतितं भूमौ दृष्टं लोकैस्त्रिभिस्तदा ॥४॥
तस्यैव सदृशं चान्यद्रावणस्योच्छ्रितं शिरः। तत्क्षिप्रं क्षिप्रहस्तेन रामेणाक्लिष्टकर्मणा ॥५॥
द्वितीयं रावणशिरश्छिन्नं संयति सायकैः। छिन्नमात्रं ततः शीघ्रं पुनरन्यत्प्रदृश्यते ॥६॥
तदेप्यशनिसंकाशैश्छिन्नं रामेण सायकैः। एवमेव शतं छिन्नं शिरसां तुल्यवर्चसाम् ॥७॥
न चैव रावणस्यांतो दृश्यते जीवितक्षये ॥८॥

त्यामुळे रावणाचे कंठावर प्रहार होऊन त्याची दहाही शिरे पडली: सायुज्याचा निर्वाणबाण। निज कृपेंचें संधान पूर्ण। करोनियां रघुनंदन। कंठनाळ जाण छेदिलें ॥३६॥ दिव्यतेजें अद्‌भुत। मुकुटकुंडलें समवेत। कंठ छेदितां रघुनाथ। आश्चर्य तेथ वर्तलें ॥३७॥

परंतु पुनः तशीच अगणित शिरे वर आली व गेली: दहाहीं शिरें भूमीं पडतां। आणीक तैसींच तत्वतां। निघतीं झाली लंकानाथा। सुरां समस्तां विस्मयो ॥३८॥ तंव श्रीरामाचा अमोघ[5] बाण। संपूर्ण कार्य साधिल्यावीण। मागें सरों नेणे आपण। तेणें मागुतें निवटिलीं ॥३९॥ दहाहीं शिरें लंकानाथीं। पुनःपुनः प्रसवती[6]। बाण सवेंचि निवटिती। अत्यद्‌भुत लाघव ॥१४०॥ शिरें पुनः पुनः निघती। बाण तितुकींही निवटिती। वानर जयजयकार गर्जती। विमानीं हांसती सुरसिद्ध ॥४१॥ अनंत शिरांचिया राशी। रावण प्रसवे आवेशीं। तितुकीं निवटितां बाणासीं। निजमानसीं आनंद ॥४२॥ बाण छेदित क्षणक्षणां। तरी अति उल्लास रावणा। पूजावया रघुनंदना। शिरें जाणा प्रसवत ॥४३॥ रावणाचार भाव पूर्ण। सर्वगत श्रीरघुनंदन। देखोनियां आपण। करी निंबलोण निजशिरीं ॥४४॥ कंठीं लागतां श्रीरामबाण। अति आल्हादें रावण। पूजिता झाला रघुनंदन। सावधान अवधारा ॥४५॥ सर्वगत श्रीरामासी। देखोनि रावण उल्लासीं। निजशिरें अति प्रीतीसीं। राघवासी ओंवाळी ॥४६॥ अति उल्लासीं लंकानाथ। दहाही शिरें ओंवाळित। तेणें धणी न माने चित्त। मग प्रसवत आणिक ॥४७॥ अल्प अर्पितां श्रीरामचरणीं। न पुरे रावणाची धणी। छेदोनि श्रीरामबाणीं। अर्पित चरणीं अति प्रीतीं ॥४८॥ अल्प अर्पितां

शब्दार्थ : १. आश्रयस्थाने, २. परकी, ३. वर्तन, ४. स्थान, ५. व्यर्थ न जाणारा. ६. उत्पन्न होऊ लागली.

श्रीरामचरणीं। अनंत विस्तार त्रिभुवनीं। ऐसा निश्चय कळावया जनीं। शिरें रामचरणीं अर्पित ॥४९॥ निजशिरांची लक्षपूजा। रावणें केली रघुराजा। देह धरिला जया काजा। तें अति वोजा साधिलें॥१५०॥ अनंत शिरांचिया राशी। अर्पितां श्रीरामचरणांसी। अति उल्लास रावणासीं। निजहरिखेंसीं बोलत॥५१॥ श्रीरामाचें निजसामर्थ्य । स्तविता झाला लंकानाथ। श्रोतीं अवधान द्यावें तेथ । अति विख्यात चरित्र ॥५२॥ श्रीरामरावणांचें श्रवण। श्रोता वक्ता अतिपावन। एका जनार्दना शरण। श्रीरामकथन अवधारा॥५३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणशिरच्छेदनं नाम द्विषष्टितमोऽध्यायः॥६२॥ ओंव्या॥१५३॥ श्लोक॥८॥ एवं॥१६१॥

## अध्याय त्रेसष्टावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

### रावणाचा वध

उभय सैन्याला उद्देशून रावणाने केलेली श्रीरामांची स्तुती : श्रीरामें रावण जाण। निजबोधबाणेंकरून। निवटिंतांचि संपूर्ण। काय दशानन बोलत॥१॥ ऐका गा हे सेनास्थित[1]। नर वानर राक्षस बहुत। उभय सेनेचे समस्त। माझा वचनार्थ परिसावा॥२॥ ऐकोत देव दानव। यक्ष आणि गंधर्व। सिद्धचारणादि सर्व। श्रीरामवैभव परिसत॥३॥ श्रीराम माणूस नव्हे जाण। राम सर्वांतर्यामी पूर्ण। राम सर्वातीत सनातन। राम चिद्धन चिन्मूर्ति॥४॥ राम सकळलोककर्ता। राम ब्रह्मादिकां पाळिता। राम काळाचा आकळिता[2]। सकळांचे माथां श्रीराम॥५॥ श्रीराम आदिहेतु[3] उत्पत्ती। राम स्थितीची निजस्थिती। राम विश्रांतीची विश्रांती। गतीची गती श्रीराम॥६॥ रामें बोलविल्या वेद बोले। रामें चालविल्या वायु चाले। रामें चाळिल्या प्राण चळे। जेणें रक्षिलें देहमात्र॥७॥ रामें प्रकाशिला भास्कर। झाला सकळां प्रकाशकर। रामें निवविला हिमकर[4]। निववी साचार सकळांसी॥८॥ रामें धरिली धरा राहे। राम जीवना जीवविताहे। श्रीरामतेजें पावक[5] पाहें। देदीप्त होय पाचनीं॥९॥ रामें मोकलितां सावकाश। गगनीं उदंड अवकाश। रामविस्मरणी अहंकारास। अति उल्लास देहबुद्धी॥१०॥ राम इंद्राचा आदिइंद्र। राम नरेंद्राचा नरेंद्र। राम यमाचा संहारकर। ईश्वरा ईश्वर श्रीराम॥११॥ श्रीरामें चेतविलें पाहें। चित्त चेतनेतें धरिताहे। रामे अधिष्ठिला होये। बोध स्वयें बुद्धीसीं॥१२॥ श्रीरामप्रभावें अल्प। मनीं स्फुरती संकल्प। त्या श्रीरामाचे स्वरूप। वाग्जल्प केंवी जल्पे ॥१३॥ श्रीराम रणीं रणकल्लोळ। राम कृपाळुवां कृपाळ। राम दीनांचा दयाळ। प्रणतपाळ श्रीराम॥१४॥

माझ्या उद्धारासाठीच श्रीराम वनांत आले : देहदरिद्रें पीडतां। देखोन मज लंकानाथा। कृपा उपजली रघुनाथा। वना तत्वतां तेणें आला॥१५॥ छळोनियां कैकेयी माता। वना धाडिलें श्रीरघुनाथा। उद्धरावया लंकानाथा। वना तत्वतां राम धाडी॥१६॥

माझ्या उद्धारासाठीच परमगुरू वसिष्ठांनी रामांना सीतेसह धाडले : श्रीरामाचा गुरु वसिष्ठ। तो माझा परम गुरु श्रेष्ठ। वसिष्ठें अनिष्टइष्ट। कळलें स्पष्ट आजि मज॥१७॥ प्रबोधोनि सकळांसी। सर्वे दिधलें जानकीसी। हें अद्यापि कोणासी। जनीं जनासीं लक्षेना॥१८॥ उद्धारावया रावण। सद्‌गुरूसीं कळवळा पूर्ण। तेणें जानकीसी देऊन। रघुनंदन पाठविला॥१९॥ श्रीरामाची निजशक्ती। सीता पतिव्रता महासती । अनुग्रहावया लंकापती। लंकेप्रती स्वयें आली॥२०॥ रावण बापुडें अति दीन। तें केंवी करी सीताहरण। स्वयेंचि येवोनि आपण। दशानन

शब्दार्थ : १. सैनिक हो ! २. स्वाधीन ठेवणारा, ३. जगाच्या उत्पत्तीचे मूळ कारण, ४. चन्द्र, ५. अग्नी.

उद्धरिला ॥२१॥ जाणे स्वामीचें मनोगत। निरपराधें न करी घात। करोनि अपराधी लंकानाथ। श्रीरामें घात करूं आली ॥२२॥ श्रीरामाची निजशक्ति सीता। सतीशिरोमणी पतिव्रता। विश्वाची ते विश्वमाता। लंकानाथा कळवळिली ॥२३॥ मिनधा[1] कोप वरीवरी। माता कृपाळु अंतरी। कृपें कोपोनि रावणावरी। सहपरिवारीं उद्धरिला ॥२४॥ श्रीरामाचा नव्हे बाण। सायुज्याचा मुळ्हारी[2] पूर्ण। छेदूनि माझें दशवदन। विश्वमुख पूर्ण मज केलें ॥२५॥ जितुकें रामाचें पूर्णपण। तितुकी माझी व्याप्ति पूर्ण। लागतां श्रीरामाचा बाण। एवढी स्थिति जाण मज आली ॥२६॥ अनंत ब्रह्मांडें ज्यामाजि जाण। तो मज माजी रघुनंदन। सगळा बुडाला आपण। एवढें पूर्णपण मज आलें ॥२७॥

**श्रीराम -रावण यांची एकरूपता :** श्रीरामें वधिला रावण। कीं रावणें राम गिळिला पूर्ण। दोघांचेंही दोहीपण। हरपोनी पूर्ण श्रीराम झालें ॥२८॥ अवनी दहन[3] जीवन जाण। पवनेंसहित गगन। श्रीरामाचें रामपण। स्वयें रावण होऊन ठेला ॥२९॥ माझें रावणपण देख। राम झाला स्वयें एक। त्रिसप्त चौदा लोक। लोकालोक तेथें कैंचे ॥३०॥ सकळ सुखांचें सोलीव सुख। स्वयें श्रीराम सम्यक। त्याचाही प्रकाशक। रावण देख मी झालों ॥३१॥ चंद्रकिरणींचें अमृत। जेंवी सोमकांतें द्रवत। तेंवी श्रीरामसुख समस्त। माझेनि प्रगटत जगामाजी ॥३२॥ म्यां विरोधिलें नाहीं श्रीरामासी। उद्धरावया सकळ कुळासी। हिरोनि आणिलें जानकीसी। त्या भावार्थासी सांगेन ॥३३॥ जेथें जेथें अधिष्ठान[4]। श्रीरामाचें संपूर्ण। त्याचें करोनि निरोधन। कुळउद्धरण म्यां केलें ॥३४॥ श्रीरामकृपा सनातन। देवांवरी आहे पूर्ण। म्हणोनियां निरोधन। केलें आपण देवांचें ॥३५॥ सीता रामाची शक्ती। ते म्यां आणिली याचि प्रीतीं। धांवोनि येईल रघुपती। देईल मुक्ती सकळांसी ॥३६॥

**सीतेला ओलीस ठेविली म्हणून श्रीराम धावून आले व मी उद्धरलो :** आपुलें मागावया ठेवणें। वोल[5] धरिती शाहणे। तैसें म्यां केलें रावणें। कोप झणें कोणी म्हणा ॥३७॥ उद्धरावया सकळ कुळासी। म्यां ओली धरिली सीतेसीं। त्या ओलीलागीं राघवासी। निजमानसीं कळवळा ॥३८॥ अति प्रीतीं श्रीरघुपती। ओल सोडवावया निश्चितीं। येथें येवोनि शीघ्रगती। सकुळ लंकापती उद्धारिला ॥३९॥ लागतां श्रीरामाचा बाण। चहूं देहांसी त्रिपुटीचें भान। एकाएकीं छेदून पूर्ण। चैतन्यघन[6] मज केलें ॥४०॥ श्रीरामाचा तो नव्हे शर। चैतन्याचा धांवणेकर। सकळ कुळेंसीं दशवक्त्र। केला चिन्मात्र निमेषार्धे ॥४१॥ दिवस मास न लागतां। संधान आवेशें करितां। उडाली शून्याची शून्यवार्ता। चिदाभासता कोंदली ॥४२॥ हेत मात दृष्टांत। न रिघे ज्याचे शिंवेआंत। तो पूर्णब्रह्म रघुनाथ। सदोदित कोंदला ॥४३॥ न दिसे रामाचे रामपण। सौमित्रादि सुग्रीव सहसैन्य। सहसैन्य बुडाला रावण। चैतन्यघन कोंदला ॥४४॥ जेथें परतल्या श्रुती[7]। उपनिषदें मौनावती[8]। शास्त्रें थोंटावलीं[9] ठाती[9]। रघुपती देखतां ॥४५॥ निजविश्वासें रावण। या रीतीं रघुनंदन। स्तवोनियां आपण। करी विनवण जिवलगा ॥४६॥

राग नीरागतां गच्छ द्वेष निर्द्वेषतां भज। भवद्भ्यां सुचिरं कालमिह प्रक्रीडितं मया ॥१॥

**रावणाची रागद्वेषादिकांची प्रार्थना :** रागादिक समुदायासी। माझें लोटांगण सकळांसी। विनवीत आहे तुम्हांसी। तें विनंतीसी परिसावें ॥४७॥ तुमचे संगतीस्तव जाण। तुमचेनि धर्मेकरून। विविध भोग दारुण। म्यां संपूर्ण भोगिले ॥४८॥ सज्जनांची ऐसी स्थिती। अवंचक[10] मित्रकार्यार्थी। मज अनुग्रहिलें रघुपतीं। निजविश्रांती द्यावया ॥४९॥ माझे

शब्दार्थ : १. वरवरचा, २. बोलावणेकरी, ३. अग्नी, ४. स्थान, ५. बदली, ६. ज्ञानपूर्ण, ७. वेद, ८. स्तब्ध झाली, ९. कुंठित होऊन राहतात, १०. निष्कपट

पुत्रपौत्रादि प्रधान। बंधुसहित सकळ सैन्य। मजहीआधीं माझे जन। श्रीरामें आपण उद्धरिले॥५०॥ सकळ कुळा देवोनि मुक्ती। मजही उद्धराया निश्चितीं। राम उभा रणाप्रती। म्हणोनि तुम्हांप्रती प्रार्थितों॥५१॥ तुम्हांवेगळा मोक्ष घेतां। लागों पाहें वंचकता। म्हणोनियां तुम्ही आतां। भजा रघुनाथा सर्वभावें॥५२॥ विनवित असें कामासी। भजावें निष्काम रामासी। तेणें निजसुख पावसीं। अनायासीं श्रीरामें॥५३॥ द्वेषा तुज लोटांगण। निर्द्वेष रघुनंदन। तुवां भजुनि अविच्छिन्न[1]। पावावें कल्याण शांतीचें॥५४॥ वासनादिकां समस्तांसी। माझें लोटांगण सर्वांसी। निर्वासना श्रीरामासी। अविकळतेसीं[2] भजावें॥५५॥ तेणें तुम्हां निजसुख। वेगें पावाल आवश्यक। यालागीं मिळोनि सकळिक। रघुकुळटिळक भजावा॥५६॥

कामक्रोधादिकांचे रावणास उत्तर : ऐसें विनवितां रावण। तंव हासिन्नले कामादिगण। तुझें तुज न कळे चिन्ह। श्रीरघुनंदननिजकृपा॥५७॥ आमची वस्ती अंतरीं। राम अंतर्यामीं निर्धारीं। तो पूर्वीच आम्हांवरी। अनुग्रह करीं तुजहूनी॥५८॥ पूर्वी सर्वभावेंसीं। आम्ही अनुसरलो राघवासी। तरीच श्रीरामें रावणा तुजसी। अति प्रीतीसीं अंगीकारिलें॥५९॥ आम्ही अनुसरलों नसतां। कृपा तया रघुनाथा। नये नये गा सर्वथा। जाण तत्वतां लंकेशा॥६०॥ तूं आमुचा निजसखा। तुझेनि धर्मे सकळिकां। भेटी झाली रघुकुळटिळका। अनंत सुखा मेळविलें॥६१॥ ऐसें परस्परें येरयेर। कामादिक पैं समग्र। आणि स्वयें दशवक्त्र। येरयेर स्तविताती॥६२॥

आपल्या आघाताने रावणाचा शिरच्छेद होईना म्हणून रामबाण विस्मय पावला. त्या बाणाला रावणाकडून समज : तंव श्रीरामाचा निजबाण। करी शिरांचें छेदन। तरी पडेना दशानन। विस्मित बाण स्वयें झाला॥६३॥ देखोनि बाणाचा विस्मयो। रावण बोलतसे पहा हो। श्रीरामाचा पूर्णानुग्रहो। तुज स्वयमेवो कळेना॥६४॥ श्रीरामामृतकूपिका। अखंड माझे हृदयीं देखा। ते प्रसवत असे मुखां। तुझा आवांका तो किती॥६५॥ प्रकाशावया निजमहिमान। शिरें प्रसवत रघुनंदन। लाजली तुझी आंगवण। नामामृत जाण अनिवार॥६६॥ निग्रहो द्यावा तुम्हांसी। राम प्रसवत शिरांसी। अद्यापि न कळे तुम्हांसी। जरी अहर्निशीं जिवेंलग॥६७॥

रामनाममहिमा ऐकून रामबाण लज्जित झाला : ऐकोनि रावणाचें वचन। लाजा संकोचला बाण। अलोट नामाचें महिमान। माझी आंगवण ते किती॥६८॥ अहर्निशीं जवळी असतां। श्रीराममहिमा तत्वतां। न कळे न कळे सर्वथा। आलों वृथा संसारा॥६९॥ गुळामाजील दगड। सर्वांगीं दिसे जैसा गोड। परिपाकीं दावी निवाड। अति अवघड कठिनत्वें॥७०॥ श्रीरामाचे निजभातां। आम्ही अहर्निशीं जवळी असतां। श्रीराम न कळे तत्वतां। काय आता वल्गेजों[3]॥७१॥ श्रीरामवैभव नेणोन। स्वयें थोटावला बाण। क्षीण माझी आंगवण। करूं कंदन राहिला॥७२॥

ते पाहून रावणाकडून रामबाणाला वंदन व त्याची स्तुती: तें देखोनि दशानन। नमिता झाला श्रीरामबाण। तुझेनि धर्मे आम्हां जाण। वैभवज्ञान रामाचें॥७३॥ कंठीं लागतां तुझा घावो। हृदयीं झाला आविर्भावो। सर्वसाक्षी श्रीरामरावो। अद्वितीय अखंड॥७४॥ अद्वितीय श्रीरघुनाथ। ऐसा बाणला इत्यर्थ। तेचि नाममृतकूपिका येथ। शिरें अनंत प्रसवती॥७५॥ एकदेशी परिच्छिन्न। होतों करंटा दशवदन। तो सर्वगत सनातन। श्रीरघुनंदन स्वयें झालों॥७६॥

शब्दार्थ : १. सतत, २. एकनिष्ठेतेने, ३. बोलो.

तरी सज्जनांचा ऐसा महिमा। भेटलिया उत्तमाधमां[1]। उडवोनि द्वंद्वधर्मा[2]। निजधामा पाववित ॥७७॥ चोरटा वाल्मीक तत्वतां। नारद भेटला अवचितां। निरसोनि मागील दुरिता। अनागतवक्ता[3] पैं केला ॥७८॥ तैसें तुझे आघातें येथ। निरसूनि माझीं सकळ दुरित। पावविलों श्रीरघुनाथ। कृतकृत्य करूनी ॥७९॥ परस्परें दोघे जण। येरयेरांचें करितां स्तवन। शब्दासी उपरति होऊनि पूर्ण। समाधान पावले ॥८०॥ उपरति होवोनि शब्दांसी। स्मरतां श्रीरामस्वरूपासी। बाहेर देहाची दशा कैसी। न कळतां भूमींसीं उलंडले ॥८१॥ रावणाचीं पंचमहाभूतें। मिनलीं भूतात्म्या श्रीरामातें। इंद्रियचेष्टाही तेथें। चिन्मूर्तीतें विनटल्या ॥८२॥

स शरो रावणं हत्वा रुधिरार्द्रमुखच्छविः। भृत्यवत्कर्मणि कृते स तूणं पुनरागतः ॥२॥

**रावणाचा शिरच्छेद करून तो बाण पुनः रामांच्या भात्यांत शिरला :** भूमीवरी पडतां रावण। आनंदक्षय झाला बाण। कार्य साधिलें संपूर्ण। नमून रघुनंदन भातां रिघे ॥८३॥ जेंवी इतर सेवक। स्वामिकार्य साधूनि देख। स्वयें परते एकाएक। विजयसुख सांगत ॥८४॥ जैसी स्वामीची आज्ञा होती। कार्य साधिलें त्याच रीतीं। ऐसें सांगोनि स्वामीप्रती। धरी उन्नती निजगर्वे ॥८५॥ तैसा नव्हे श्रीरामबाण। अजय त्रैलोक्यीं रावण। त्याचें करोनि निर्दळण। अणुही जाण गर्व नाहीं ॥८६॥ मौनेंचिकरीं श्रीरामासी। बाणें नमोनि वेगेंसी। जाणोनि स्वामीच्या वैभवासी। रिघे पाठीसीं भात्यांत ॥८७॥ लौकिकीं प्रथा[4] ऐसी। जे वधावया रावणासी। प्रसन्न करोनि सूर्यासी। रामें दशवक्त्रासी निवटिलें ॥८८॥ ज्याचेनि तेजें रविशशी। प्रकाशरूप जगासीं। तो शरण जाईल आणिकासीं। कदा काळेंसीं घडेना ॥८९॥

**प्रचंड रावण रणभूमीवर कोसळला :** भूमीं पडतां दशकंठ। प्रवाहे रुधिराचा लोट। चिडाणी[5] झाली उद्भट। झाला शेवट युद्धाचा ॥९०॥ द्रुम शिखरेंसहित। जेंवी उलंडे पर्वत। तेंवी पडला लंकानाथ। अति विख्यात पुरुषार्थी ॥९१॥ भूमीं पडतां रावण। दणाणिलें त्रिभुवन। कैलास झाला आंदोलायमान। सत्यलोक पूर्ण डळमळिला ॥९२॥ विसां खांदियांचें दिंड। झाड उन्मूळिलें वितंड। तेंवी वीसही बाहु प्रचंड। रावण उदंड उलंडला ॥९३॥ सुवर्णबंदी कार्मुक। भूमीं लोळत असे देख। बाण पडिले रुक्मपुंख। शस्त्रें अनेक लोळती ॥९४॥ रत्नजडित मुकुट। भूमीं लोळत तेजिष्ठ। रणीं पडला लखलखाट। जडित उद्भट भूषणें ॥९५॥

**रणभूमीवरील विदारक दृश्य :** महावीर रणकर्कश। रणयोद्धे अति दुर्धर्ष। रणीं पडले बहुवस। मोकळे केश लोळती ॥९६॥ बाहु लोळती सांगद[6]। मस्तकें मुकुटेंसीं विविध। करचरणहित कबंध[7]। रणीं बहुविध लोळती ॥९७॥ कोटी सैन्य रणीं पडत। तैं एक कबंध उठत। ऐसी बंधें अनंत। सैरा रणांत धांवती ॥९८॥ असंख्य सैन्य पडिलें रणीं। रत्नखचित मुकुटाभरणीं तेथें पातल्या पक्षिश्रेणी[8]। विचित्र ध्वनीं बोलत ॥९९॥

**मांसभक्षणार्थ पशु-पक्ष्यांचे व भूतादिकांसह कात्यायनी चामुंडा व कंकाळीचे आगमन :** घार गीध श्येन काक। गोमायु[9] पातले असंख्य। मांसभक्षणीं अति हरिख। रणीं सकळिक मानिती ॥१००॥ भूतें पातलीं तत्क्षणीं। नव कोटी कात्यायनी। छपन्न कोटी दळ घेऊनी। चामुंडायणी पातली ॥१॥ औट कोटी भूतावळी। घेवोनि आली कंकाळी। नाचों लागलीं गोंधळीं। मांस सकळीं सेवावया ॥२॥ सेवावया मांस रुधिर। येरापुढें धांवे येर। दुजे म्हणती परतें सर। हावें फार भरलीस ॥३॥ एक म्हणती आलों पहिलें। दुजा म्हणे नवल झालें। शेंती

---

**शब्दार्थ :** १. उंच आणि नीच यांना, २. द्वैतभावाला, ३. भविष्यवादी, ४ प्रसिद्धी, ५. चिखल, ६. अंगदभूषणांसहित, ७. घडे, ८. पक्षिसमूह, ९. कोल्हे.

रावण ठेविलें। त्यासीं काय आलें धणीपण॥४॥ पहिलें होतासी राखण। तरी भाते घे पां मोजून। अमूप घ्यावया आंगवण। सर्वथा जाण तुज नाहीं॥५॥ बळें घेऊं जाय आवेशीं। दुजा त्यातें सुबद्ध धुमसी[1]। बोंब सुटली रणभूमीसीं। कलह भूतांसीं लागला॥६॥

सर्व भूतांचे भांडण चामुंडेनें सोडवून श्रीराम महिमा त्यांना कथन केला : सकळां श्रेष्ठ चामुंडायणी। तिणें देखोनि झोंटधरणी। सकळां समीप बोलावूनी। पुसे भांडणीं काय काज॥७॥ तेही सांगती वृत्तांत। येरी खदखदां हांसत। तुमचा कलह समस्त। लागला येथ तोडावा॥८॥ श्रीराम रणामाझारी। पीक आलेंसे घुमरी[2]। तुम्हांसीं भांडण परस्परीं। भक्षावारी लागलें॥९॥ पूर्विले वेळे हनुमंतें। विभागून यथार्थें। समजावोनि सकळांतें। केलीं भूतें पैं तृप्त॥११०॥ त्याहूनि आतां येथें। तृप्ती होईल सकळांतें। संदेह न धरावा चित्तें। श्रीराम रणातें पावूनी॥११॥ नाम स्मरतां रघुनाथ। महापापी उद्धरत। तो संमुख असतां रणाआंत। कोण अतृप्त राहूं शके॥१२॥ ज्याचे दासाचेनि सामर्थ्यें। तृप्ती झाली सकळ भूतांतें। तो श्रीराम असतां येथें। केंवी अतृप्तें रहाल॥१३॥ सहिष्णुर्विजयी भवेत्। ऐसें श्रुतिशास्त्र गर्जत। त्वरा न करावी तुम्हीं येथ। तृप्ति अद्‌भुत पावाल॥१४॥ ऐसें चंडेश्वरी बोलतां। आनंद झाला सकळ भूतां। कलह सांडून परता। भाग तत्वतां वांछिती॥१५॥

श्रीरामाज्ञेने रामबाणाने सर्व मांसाची वांटणी केली: श्रीराम नेटका विंदानी। आज्ञापिलें बाणालागूनी। आदरिली भागवांटणी। सावधानीं अवधारा॥१६॥ श्रीरामबाण तो मापारी। नरकपाल कुडवेंकरीं। मविता[3] झाला अति कुसरीं। खळेकरी भैरव॥१७॥ छप्पन्न कोटी भूतावळी। घेऊन आली भद्रकाळी। मानिली भूजगणीं सकळीं। स्वामिणी भली राजभागा॥१८॥ नवकोटी सैन्यासमवेत। कात्यायनी पातली तेथ। प्रजाभाग पैं समस्त। हातोहात तिणें नेला॥१९॥ सैन्य घेवोनि औटकोडी। चामुंडा आली लवडसवडी। शेषतळा उडाउडीं। अति तांतडीं घेऊनि गेली॥१२०॥ निजसमुदायासकट। झाली कंकाळी प्रकट। पाडेवरीचे जे पाट। तेणें उद्भट सुखावली॥२१॥ बलुतें[4] काढिलें उभेरासी। मेसको घेवोनि गेली त्यासी। सुखावोनि निजमानसीं। श्रीरामासी ओवाळिती॥२२॥ मेसकोची निजदासी। ते मारको आली आवेशीं। खळें मातेरें देवोनि तिसी। अति प्रीतीसीं समजावी॥२३॥ पाडव आणि मापारी। कराळी त्यातें अंगीकारी। श्रीरामबाण जो मापारी। आपण करी दास्य त्याचें॥२४॥ भैरव वेताळ दोन्ही। देव ब्राह्मण त्यांलागूनी। देवोनि अति सन्मानीं। रणांगणी सुखी केले॥२५॥ पिराणा आणि फकिराणा। मैळीमुकीलागोनि जाणा। देवोनियां अति सन्माना। रणामाजी गौरविलीं॥२६॥ रणामाजीं समस्तें। बाणें समजाविलीं भूतें। संतोष मानोनि चित्तें। निजभागातें पैं घेती॥२७॥

शरीरभागांची विभागणी: मुख्य काळीज तो राजभाग। कालिका घेवोनि गेली सांग। मज्जा जो कां प्रजाभाग। कात्यायनी सवेग घेऊन गेली॥२८॥ मांगभाग चामुंडेसी। रुधिर तें कंकाळीसी। मेद दिधलें मेसकोसी। अस्थि मारकोसी पैं देखा॥२९॥ भाग वांटिती ते वेळे। मागत्याचे मिळती पाळे। म्हणोनि धर्मालागीं वहिलें। शिर काढिलें पैं देखा॥१३०॥ धर्मार्थ सार अर्पिती। ते उभयलोकीं सुख भोगिती। यालागीं उत्तमांगें[5] निश्चिती। धर्माप्रती अर्पिलीं॥३१॥ तेणें भैरव वेताळ। दोघे पावले सुखकल्लोळ। त्वचा काढिली जे सकळ। ते नेली तत्काळ मैळ्यामुक्या॥३२॥ खंकाळें जे आणिकीं भूतें। निःशेष विसरोनि रामातें।

शब्दार्थ : १.ताडन करी, २. अमूप, पुष्कळ, ३. मोजणारा, ४. नोकरीबद्दल दिले जाणारे धान्य, ५. मस्तके.

सैरा धांवती खाकातें[1]। विषयभोगातें वांछूनि॥३३॥ त्यांचे तृप्तिलागीं देख। लिंग काढून देती एक। तेणेचि करोनि तृप्तिसुख। तेंही अशेख मानिलें॥३४॥ एवं सकळां निजतृप्तीं। श्रीरामबाणें निश्चितीं। करोनियां शीघ्रगतीं। रणीं समस्तीं गौरविलें॥३५॥ तेणें सुखावलीं समग्र। होवोनिया आल्हादपर। परस्परें पाहुणेर। अत्यादर मांडिला॥३६॥ देखतांचि श्रीरघुनाथ। आनंद कांदला बहुत। कलह तुटला समस्त। सुख अद्भुत उलथलें[2]॥३७॥ पहिलीं झालीं जीं भांडणें। तीं विसरावयाकारणें। घालिती येरयेरां जेवणें। देती वाणें परस्परें॥३८॥ अत्यंत होवोनियां नम्र। परस्परें अत्यादर। भोजन मांडिलें एकत्र। मांसरुधिरसमरसीं॥३९॥ महावीरांचा रणमद। तेंचि भोजनीं घेती मद्य। मांस भक्षिती विविध। अति आल्हाद मांडिला॥१४०॥ मेद आणि मद्यमांस। आवडीं सेवितां सावकाश। आनंद चढला भूतांस। रणभूमीसीं नाचती॥४१॥ विश्वजननी सीता सती। धरोनि आणिली लंकापतीं। तें सुटावया निश्चितीं। नवसी होती नवसिले[3]॥४२॥ तो दुरात्मा रावण। श्रीरामबाणेंकरून। वधिला न लागतां क्षण। आनंद पूर्ण तेणें त्यांसी॥४३॥ सिद्धी पावले नवस। तेणें आनंद भूतांस। मिळोनियां रणभूमीस। निज नवस उजविती॥४४॥ आदिशक्ति सीता सती। तीलागीं सकळही भूतीं। मिळोनियां रणाप्रती। गोंधळ घातला स्वानंदें॥४५॥ काळी कराळी कंकाळी। मारको मेसको भद्रकाळी। हरिखें लंकेच्या पाबळीं। गोंधळ सकळीं मांडिला॥४६॥ काहळा भोंवळा मांदळ। गिडबिडीं गुजबुजीं टाळ। सूक्ष्म वाद्यें चिनकाहळ। तुरें बंभाळ वाजविलीं॥४७॥ रणीं यक्षिणी निजवेशीं। विसरोनि देहभावासी। नाचों लागलीं उल्लासीं। अति प्रीतीसी स्वानंदें॥४८॥ मेद मांस रुधिर। प्रीतीं वांटिती येरां येर। उन्मत्त झाली अपार। करिती गजर आल्हादें॥४९॥ तृप्ति झाली रणभूमीसीं। तेणें आनंद भूतांसी। स्तविते झाले श्रीरामासी। निजगजरेंसीं अति प्रीतीं॥१५०॥ दुर्जय जो त्रैलोक्यासीं। जेणें निग्रहिलें देवांसी। त्या निवटिलें रावणासी। श्रीरामें ऐसी ख्याति केली॥५१॥ जन्मादारभ्य[4] आजिवरी। सकळ भूतां एकसरी। तृप्तिदाता संसारी। कोणी धरेवरी नव्हताचि॥५२॥ तीं आजि श्रीरघुनाथें। तृप्त केली सकळ भूतें। म्हणोनि गोंधळ ये रणभूमीतें। सावचित्तें माजविला॥५३॥ तरी नवल नाहीं याचें। राम जीवन जगाचें। पाळण करावें सृष्टीचें। हेंचि श्रीरामाचें निजव्रत॥५४॥ राम विश्वाचा विश्वात्मा। रम जीवाचा जीवात्मा। राम पराचा परमात्मा। राम परमात्मा निजाचा॥५५॥ ऐसे करितां स्तवन। उडालें भूतांचे भूतपण। अवघीं झालीं चैतन्यघन। श्रीरघुनंदननिजकृपा॥५६॥ वधोनियां अहंरावण। विजयी झाला रघुनंदन। एका जनार्दना शरण। सुखसमाधान श्रीरामें॥१५७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धाकांडे एकाकारटीकायां रावणवधो नाम त्रिषष्टिमोऽध्यायः॥६३॥ ओंव्या॥ १५७॥ श्लोक॥२॥ एवं॥१५९॥

## अध्याय चौसष्टावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### रावणस्त्रियांचा विलाप

रावणवधानंतर सैन्याची दाणादाण व पळापळः करोनिया रणकंदन। ससैन्य रणीं रावण। स्वयें पाडिला आपण। उरलें सैन्य देशोधडी॥१॥ एकीं दिगंतर लंघिलें। एकां कंठीं प्राण उरले। एकां गात्रां कंप सुटले। एक निमाले आपधाकें[5]॥२॥ एकें झालीं भ्रमित। एकां सुटला अधोवात। एकां मूत्रवृष्टि होत। प्राण सांडित उभ्यांउभ्यां॥३॥ एक होवोनि कासाविसी।

शब्दार्थ : १. ओरडत, २. उद्भवले, ३. नवस बोलणारे, ४. जन्मापासून, ५. आपणच धास्ती घेऊन.

रडत पडत रणभूमीसीं। बोंब घेवोनि वेगेंसीं। आलीं लंकेसीं सांगत ॥४॥ एक सांडिती लेणीं लुगडीं। एक तृण धरिती तोंडीं। एकांचि वळली बोबडी। पडली मुरकुंडी एकांची ॥५॥

अनेकांची दीनवाणीने श्रीरामांनी ठार करू नये म्हणून प्रार्थना : एक येती काकुळती। मारं नको रघुपती। शरण आलों तुजप्रती। करिसी किती संहार ॥६॥ एक म्हणती माजी[1] रणा[1]। झुंजों आलों नाहीं जाणा। पहावया युद्धरचना। रामरावणरणामाजी ॥७॥ एक येवोनि काकुळती। श्रीरामातें विनविती। धरोनि आणिलें बहुतीं। रणख्याती नाहीं आलों ॥८॥ एक विनविती रामासी। व्यर्थ न मारीं आम्हांसी। सणा आलों दिवाळीसीं। जामातें परियेसी सासुरियां ॥९॥ कोणी आला पाहुणा । कोणी आला दिवाळसणा। मारूं नको रघुनंदना। जीवदाना आम्हां देईं ॥१०॥ ऐसें येती काकुळती। भूमीं गडबडां लोळती। बाण गेला रामाप्रती। तरी बरळती आपधाकें ॥११॥ रामें वधिला रावण। देखोनियां राक्षसगण। सैरां पळती रानोरान। देहलोभेंकरून निजभयें ॥१२॥

तं दृष्ट्वा निहता भूमौ हतशेषा निशाचराः। हतनाथा भयत्रस्ताः सर्वतो विप्रदुद्रुवुः ॥१॥
सर्वतश्चाभिपेतुस्तान्वानरा द्रुमयोधिनः। दशग्रीववधं दृष्ट्वा विजयं राघवस्य च ॥२॥

शत्रुसैन्याची दाणादाण पाहून वानरसैन्याचा आनंदोत्सव : भूमीं पडतां रावण। दशदिशा रक्षोगण। रडत पडत पळती जाण। निशाचरगण अति दुःखी ॥१३॥ तें देखोनि वानर। अवघे झाले आल्हादपर। नाचों लागले समग्र। करिती गजर नामाचा ॥१४॥ एक झेलीत पर्वतशिखरें। एक झेलीत वृक्षाग्रें। हरिखें नाचती वानरें। रावण रघुवीरें निवटिला ॥१५॥ नमन करिती येरयेरें। क्षेम[2] देती परस्परें । किराणें देती अति आदरें। रावण रघुवीरें निवटिला ॥१६॥ एक गर्जती भुभुःकारें। एक गर्जती नामोच्चारें। झालीं आनंदें निर्भरें। रावण रघुवीरें निवटिला ॥१७॥ जो नागवे त्रैलोक्यासी। यम काळ कांपती ज्यासी। त्या निवटिलें रावणासी। निजबाणेंसीं श्रीरामें ॥१८॥ जो न भिये शंकरासी। आंदोळिले कैलासासी। त्या निवटिलें रावणासी। निजबाणेंसीं श्रीरामें ॥१९॥ दंडोनियां लोकपाळांसी। बंदीं घातलें देवांसी। त्या निवटिलें रावणासी। निजबाणेंसीं श्रीरामें ॥२०॥

हर्षातिशयाने त्या वानरांचे श्रीरामांना वंदन: सकळ होवोनि उल्लासी। लागले श्रीरामचरणासी। रामें आलिंगिलें प्रीतीसीं। निजमानसीं स्वानंदें ॥२१॥ निजमदें शिवापासीं। भोगूं मागें पार्वतीसी। त्या निवटिलें रावणासी। निजबाणेंसीं श्रीरामें ॥२२॥ बिभीषण शरणागत। पुरले त्याचे मनोरथ। होवोनियां आनंदभरित। जीवें ओंवाळित श्रीरामा ॥२३॥ सुग्रीवराजा वानरनाथ। तेणें धरिलें होतें व्रत। न वधितां लंकानाथ। किष्किंधे निश्चित नाहीं जाणें ॥२४॥ सिद्धि पावलें निजव्रत। रामें वधिला लंकानाथ। तेणें आनंदे उपरमत[3]। येवोनि रघुनाथ नमियेला ॥२५॥ वनें वन हिंडतां। अति श्रम शुद्धि करितां। झाला होता हनुमंता। जो लंकानाथा निजघाती ॥२६॥ ते निरसिली सकळ व्यथा। वध झालिया लंकानाथा। श्रीरामा भेटेल सती सीता। सार्थकता कष्टांची ॥२७॥ म्हणोनियां आल्हादपर। प्रेमें नाचे हनुमान वीर। करीत नामाचा गजर। श्रीरामचंद्र नमियेला ॥२८॥ हनुमंताचा परम आप्त। अंगद युवराजा विख्यात। त्याचे पुरले मनोरथ। लंकानाथ निवटिला ॥२९॥ तेणें हरिखें नाचत। श्रीरामप्रेमें डुल्लत। त्याचे पुरले मनोरथ। सावचित्त आनंदें ॥३०॥ नळ नीळ जांबवंत। सुषेण वैद्यराज तेथ। तारतरळादि समस्त। हरिखें नाचत अति प्रेमें ॥३१॥ रामनामाच्या निजगजरीं। केला भुभुःकार दीर्घस्वरीं। श्रीरामचरण प्रीतीकरीं। वानरवीरी वंदिलें ॥३२॥ अवघे आनंदें

शब्दार्थ : १. रणांगणामध्ये, २. आलिंगन, ३. उल्लास पावत.

नाचती। श्रीरामप्रेमें डुल्लती। श्रीरामगुणकीर्ति वर्णिती। गीतीं गाती श्रीरामा ॥३३॥ एक झाले नृत्यकारी। एक गर्जती कैवारीं। वेगें होवोनि नागारी[1]। कीर्तिगजरीं। वाखाणिती ॥३४॥ एक होवोनि वैष्णव। पदीं वर्णितां राघव। उथळले[2] अष्ट प्रेमभाव। देहभाव विसरले ॥३५॥ एक तीं भावार्थें साबडीं। तोंडें करोनि वांकुडीं। धरिते झाले बागडी[3]। निजनिर्वडीं[4] निजप्रेमें ॥३६॥ निजप्रेमाचेनि समाजें। हरिखें नाचती निजभोजें। विसरोनियां माझें तुझें। श्रीरघुराजें संतुष्ट ॥३७॥ तें देखोनियां स्वस्फूर्तीं। विसरोनियां रघुपती। खांदीं घेवोनियां प्रीतीं। हरिखें नाचती श्रीरामनामें ॥३८॥

स्वर्गस्थ देवांना परमानंद व श्रीरामांवर पुष्पवृष्टी : तें देखोनि सुरवर। स्वर्गीं झाले आल्हादपर। विजयी झाला श्रीरामचंद्र। दशवक्त्र निवटिला ॥३९॥ दिव्यसुमनीं निजगजरीं। वर्षले श्रीरामाचे शिरीं। अवघें कटक जयजयकारीं। पुष्पेंकरी मंडित ॥४०॥

अथांतरिक्षे व्यनदन्सौम्यस्त्रिदशदुंदुभिः। दिव्यगंधवहास्तत्र मारुताः सुमुखं ववुः ॥३॥
निपपातांतरिक्षाच्च पुष्पवृष्टिस्तथा भुवि ॥४॥

देवांकडून स्तवन, गंधर्वांचे गायन : मंद सुगंध सुशीतळ। वेगें पातला मलयानिळ[5]। समस्तां श्रमस्वेदकल्लोळ[6]। तेणें तत्काळ निरसिला ॥४१॥ अंतरिक्षगगनींहूनी। प्रकट झाली आकाशवाणी। राम विजयी रणांगणीं। दशानन निवटिला ॥४२॥ चिरंजीवी रघुनाथा। निवटोनियां लंकानाथा। सुरां सोडविलें समस्तां। बंदिमोचनता पैं केली ॥४३॥ तेणें सकळ सुरगण। आनंदमय होऊनि पूर्ण। वर्णिती श्रीरामाचे गुण। दुष्ट दशानन निवटिला ॥४४॥ जो अजेय त्रैलोक्यासी। बंदी घातलें सुरवरांसी। दासकाम घे आवेशीं। भय मानसीं असेना ॥४५॥ ते दुष्ट सेवेपासूनि जाण। श्रीरामें सोडविलें आपण। मिळोनियां गंधर्वगण। करिती गायन आनंदें ॥४६॥ नारद तुंबर दोघे जण। वसुधामा सुलोचन। चित्रांगदेंसहित जाण। सुस्वर गायन मांडिले ॥४७॥

एते गंधर्वराजानो ह्यंतरिक्षस्थिता जगुः। उर्वशी मेनका रंभा घृताची च तिलोत्तमा ॥५॥
अंतरिक्षे सुसंहृष्टा ननृतुश्चाप्सरोगणाः ॥६॥

अप्सरांचे नृत्य : गंधर्वराजे पांचही जाण। वीणा घेवोनि आपण। रागोद्धार करिती पूर्ण। सुस्वर गायन मांडिलें ॥४८॥ तंव पावल्या स्वर्गनायिका। रंभा ऊर्वशी मेनका। घृताची तिलोत्तमा देखा। हर्षात्मका नाचीत ॥४९॥ निजानंदें स्वर्गसुंदरीं। नृत्य करितां चांचरी[7]। देहभाव सांडिला दूरी। राम अंतरीं धरोनियां ॥५०॥ देव गंधर्व सकळिक। देवांगना मिळोनि देख। अवघीं नाचती समसुख। रामें दशमुख निवटिला ॥५१॥

रावणवधामुळे सगळीकडे आनंदोत्सव : रावणतेजें दुर्धर। झांकोनियां दिवाकर। पडिला होता अंधकार। तो रामें समग्र निवटिला ॥५२॥ श्रीरामतेजें भास्कर। उजळोनियां अति शीघ्र। झाला सकळप्रकाशकर। दिशा समग्र उजळल्या ॥५३॥ चंद्र झाला होता प्रभाहीन। तो श्रीरामतेजेंकरून। उजळला न लागतां क्षण। विज्वर पूर्ण तो झाला ॥५४॥ इंद्र वरुण आणि कुबेर। नैर्ऋत्य ईशान आणि महारुद्र। अग्नियमादि समग्र। हरिखें थोर दाटले ॥५५॥ नष्ट दुरात्मा रावण। करोनि[8] सकळांचें रोधन[8]। सेवा घेतसे दारुण। रामें निर्दळण केलें त्याचें ॥५६॥ म्हणोनियां आल्हादपर। नृत्य करिती समग्र। मांडिलासे अति गजर। जयजयकार आनंदें ॥५७॥ दिवि भुवि अंतरिक्ष। नभोमंडळीं सावकाश। अवघे झाले स्वप्रकाश। दुष्ट राक्षस निर्दळिला ॥५८॥ तेणें उजळलें जगतीतळ। सुर आनंदले सकळ।

शब्दार्थ : १. गरुड, २. उत्पन्न झाले, ३. बागडू लागले, ४. आपल्या कौशल्याने, ५. मलयवायू, ६. श्रमाने आलेले घामाचे लोट, ७. भोवळ आली. ८. बंदीत घालून.

करिती नामाचा कल्लोळ। सुखसुकाळ माजविला॥५९॥ फिटला द्वंद्वदुःखदुकाळ। पाहिला स्वसुखसकाळ। श्रीराम ओळला[1] प्रबळ। स्वपदीं सकळ स्थापिले॥६०॥

वानरसैन्याकडून श्रीरामांची पूजा: ऐसा आनंद सुरवरीं। येरीकडे श्रीरामभारीं[2]। सौमित्रादिक महावीरीं। पूजा प्रीतिकरीं मांडली॥६१॥ सौमित्र आणि हनुमंत। बिभीषण शरणागत। सुग्रीव अंगद जांबवंत। जुत्पति समग्र आनंदले॥६२॥

ततस्तु सुग्रीवबिभीषणादयः सुहृद्विशिष्टाः स च लक्ष्मणस्तदा।
समीक्ष्य हृष्टा विजयेन राघवम् रणेऽभ्यनंदन्विधिवच्च पूजयन्॥७॥
स तु निहतरिपुः स्थिरप्रतिज्ञः स्वजनबलाभिवृतो रणे रराज।
रघुकुलनृपनंदनो महात्मा त्रिदशगणैरिव संवृतो महेंद्रः॥८॥

श्रीरामांची त्यांच्या भक्तांनी केलेली रूपकात्मक पूजा: मिळोनियां सकळ वीरीं। पूजोपचारसामग्री। तिहीं मांडिली अति गजरीं। संक्षेपकरीं[3] सांगेन॥६३॥ हनुमान होवोनि सिंहासन। वरी बैसला रघुनंदन। अति अंतरंग सुमित्रानंदन। पूजाविधान तो करी॥६४॥ आनंदाश्रु जे स्रवत। तेंचि उदक जाण तेथ। आपाद क्षाळण पुरवित। शरणागत बिभीषण॥६५॥ सुग्रीव भावार्थाचें वास[4]। पीतांबर राघवास। अर्पिता झाला सावकाश। अति उल्लास पूजेचा॥६६॥ निजप्रेम शुद्ध चंदन। घेवोनि आला सुषेण। सौमित्रें घेवोन आपण। केलें समर्पण रामभाळीं॥६७॥ उरलें जें प्रेमचंदन। तेणें सर्वांगीं रघुनंदन। चर्चियेला संपूर्ण। अति विचक्षण सौमित्र॥६८॥ अष्टही भाव सात्विक। तेंचि देखा जडित पदक। घेवोनियां एकाएक। जांबवंत देख पैं आला॥६९॥ देतां सौमित्राचे हातीं। येरें घेवोनि अति प्रीतीं। कंठी बांधलें रघुपती। सकळदीप्तिद्योतक[5]॥७०॥ विविध प्रीतीचे अलंकार। जडित भावार्थे नागर। भक्तिमेखळा अति परिकर। जेथें रघुवीर सांपडला॥७१॥ हनुमंताचा शिष्य अंगद। श्रीरामीं प्रेमा अगाध। त्या प्रेमभावाचा मुकुट शुद्ध। बाणला विशद रामासीं॥७२॥ सकळ मिळोनि वानरगणें। राम पूजितीं जीवें प्राणें। चैतन्यदीपें ओंवाळणें। निंबलोण सर्वस्वें॥७३॥ एकी धरिलें तन्मयछत्र। एक झाले चामरधर। एक झाले विंझणेकर[6]। भद्रीं[7] रघुवीर शोभत॥७४॥ करोनियां प्रदक्षिणा। सकळही श्रीरामचरणां। लागतां तया बिभीषणा। रावण मना आठवला॥७५॥

रावणवधाने बिभीषणाचा भयंकर शोकावेग: वधिलें देखता रावणासी। मोह उपजला बंधूसीं। अश्रु आलें जी नेत्रासीं। करीं रुद्रनासी अति दुःखें॥७६॥

भ्रातरं निहतं दृष्ट्वा शयानं निर्जिवं रणे। शोकवेगपरीतांगो विललाप बिभीषणः॥९॥

बंधु धरोनि पोटेंसीं। विलाप करी दुःखावेशीं। बहु शिकविलें नायकसी। व्यर्थ रामासी विरोधिलें॥७७॥ दैवानुसार बुद्धि होये। तेथें तुज बोल काये। जैसें प्राक्तन ओढिताहे। प्राणी वर्तताहे तेणें कर्में॥७८॥

अथ खलु विषमः पुराकृतानां फलति हि जंतुषु कर्मणां विपाकः।
हरशिरसि शिरांसि यानि रेजुर्हरहर तानि लुंठति गृध्रपादे॥१०॥

देवादिकांना अजिंक्य असलेला रावण बुद्धिभ्रष्ट झाल्यामुळे रणांगणांत पशुपक्ष्यांचे खाद्य झाला : निजहस्तेकरोनि जाण। निजशिरें छेदोनि पूर्ण। शिवासी अर्पी रावण। तिहीं शिरीं रण[8] वसविलें[9]॥७९॥ जीं शोभती शिवमस्तकीं। मुकुटमंडित जडित माणिकीं। त्यांसी झडपिती पांखी। निजकौतुकीं गीधधारी॥८०॥ जीं न खालावती ब्रह्मादिकां। जीं अजेय तिहीं लोकां।

शब्दार्थ : १. कृपायुक्त झाला, २. श्रीरामसैन्यात, ३. थोडक्यात, ४. वस्त्र, ५. तेजाचे प्रकाशक, ६. वारा घालणारे, ७. सिंहासनी, ८. रणभूमी, ९. अंगीकारिले, रणभूमीवर पडली.

तीं रणीं लोळती देखा। गोमायुकापायांतळीं ॥८१॥ निजप्रीतीच्या कल्लोळी । शिवें धरियेलीं मौळीं। तीं लोळती पायांतळीं। गीधमंडळीमाझारी ॥८२॥ प्रारब्धभोग बलवत्तर। त्यासी कांही न चले सूत्र। रसीं लोळतो दशवक्त्र। कर्मतंत्र सोडीना ॥८३॥ शंकरवरदेंकरून। लंकेचा राजा रावण। त्याचीं शिरें धुळीमाजी जाण। रणांगणीं पूर्ण लोळती ॥८४॥ निजहस्तें छेदोनि वहिलीं। जीं शिवमस्तकीं अर्पिलीं। तीं दुष्टकर्मे व्यापिलीं। गिधीं विदारिलीं घडे केंवी ॥८५॥

दैवगती ज्ञानी लोकांनाही अतर्क्य, शिवभक्त असूनही विष्णूचा रावणाने आजन्म द्वेष केला: तेचिविषयीं उत्तर। श्रोते परिसोत सादर। अति सूक्ष्म कर्मसूत्र। नव्हे गोचर सज्ञाना ॥८६॥ शिव सर्वस्वें सेविला। विष्णु सर्वस्वें द्वेषिला। तेणें भेदें नागवला। डोल[1] पडिला भजनार्सी ॥८७॥ विष्णु शिवाचें निजध्येय। शंकर विष्णुचें हृदय। उभयांसी जो भेद पाहे। दुर्दशा लाहे नवल कोण ॥८८॥

शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः। यथा शिवमयो विष्णुस्तथा विष्णुमयः शिवः ॥११॥
यथांतरं न पश्यामि तथा मे स्वस्ति चायुषि ॥१२॥

ब्रह्मा धरोनि मुंगीवरी। शिव व्यापक चराचरीं। विष्णुशंकरां बाह्यांतरीं। दोघांमाझारीं भेद नाहीं ॥८९॥ विष्णु शिवाचें हृदय। शिव विष्णूचें अंतर्बाह्य। निजदेहासीं निश्चय पाहें। भेदाची सोय सांडूनी ॥९०॥ अनवच्छिन्न[2] ऐसें पाहतां। त्यासीं भय नाहीं सर्वथा। निरसोनियां भयाची वार्ता। अक्षयता सुखरूप ॥९१॥ तैसें न करीच रावणू। भेद वाढविला शिवविष्णू। वाढविला भजनाभिमानू। द्वेषिला विष्णु भेदबुद्धीं ॥९२॥ विष्णूची निजशक्ति तत्वतां। पतिव्रता माउली सीता। ते अभिलाषिली लंकानाथा। दुष्कर्मता आन[3] कोण ॥९३॥

गुरुपत्नी सीतेची अभिलाषा सर्व नाशाला कारण : श्रीराम जगद्गुरु तत्वतां। त्याची निजशक्ति सीता। अभिलाषितां लंकानाथा। गुरुतल्पगता सहजचि ॥९४॥ गुरुतल्पगतेपुढें आन। पाप कोण आहे दारुण। तेणें घोरकर्मे रावण। गीधचरणीं पूर्ण लोळत ॥९५॥ भल्याचें शिकविलें नायकें। तो सुखाचें मुख केंवि देखे। अभिलाषितां रामनायिके। हारविलीं सुखे महाभोग ॥९६॥ मंचक कनकाचा संपूर्ण। जडितरत्नीं सुलक्षण। नवग्रहांची पाउटी जाण। तेथें दशानन शयनस्थ ॥९७॥ तें शरीर आजि येथ। सैरां रणभूमीसीं लोळत। स्रक्चंदनें[4] जें मंडित। तें विदारिती घारी गीध ॥९८॥ जडित अंगदीं प्रचंड। जे मंडित बाहुदंड। त्याचें झालें खंडविखंड। रणीं वितंड विखुरले ॥९९॥ जिहीं भुजीं त्रिभुवन। बळें आकळिलें संपूर्ण। ते हे रणांगणीं आपण। इतस्ततां जाण विखुरले ॥१००॥ सूर्यप्रभेसमान मुकुट। मस्तकीं घाली दशकंठ। त्याचें होवोनियां पीठ। रत्नें उद्भट विखुरलीं ॥१॥ महाराजे मंडलवर्ती। ज्या चरणां नित्य नमिती। ते तोडरेंसहित लोळती। रणाप्रती बंधुराया ॥२॥

कोणाचाही सल्ला रावणाने मानला नाही : तुज सांगती शुकसारण। त्यांवरी कोपसी दारुण तेंचि सांगे प्रहस्त प्रधान । कोप दारुण तयावरी ॥३॥ तुझा पुत्र इंद्रजित। सांगतां त्यासी मारूं धांवत। तैसेंच कुंभकर्ण विनवित। त्यासी निर्भर्त्सित अति रागें ॥४॥ मंदोदरी निजकांता। न मानिसी तिच्या वचनार्था। तेथें माझी कायसी कथा। हाणितल्या लाता अति रागें ॥५॥ तितुकाही मानिला विषाद । परी न कळे तुझा बोध। रावण अद्वैतभक्त शुद्ध। निजानंद पावला ॥६॥

सर्व कुळाचा संहार व रामांचा द्वेष करून मुक्ती मिळविण्याची अजब युक्ती: सकळ कुळा देवोनि मुक्ती। तुवां विरोधला रघुपती। बंधो तुझी अतर्क्य युक्ती। कळली निश्चितीं आजि

शब्दार्थ : १. व्यंग, २. भेदरहित, संपूर्णपणे, ३. दुसरी, ४. पुष्पमाला, चंदन इत्यादी.

मज॥७॥ तत्काळ साधावया निजमुक्ती। सायुज्य साधिला रघुपती। तें साधिलें अति निगुती। सकळ संपत्ती अर्पूनी॥८॥ होऊनि सर्वस्वा विरक्त। समरांगणीं लंकानाथ। देखोनियां रघुनाथ। आनंदभरित झाल्रासी॥९॥ त्या आनंदाचे अति प्रीतीं। राम जाणसी सर्वांभूतीं। देह अर्पिला रघुपती। भूतसंतृप्तीलागूनी॥११०॥ समो नागेन समो मशकेन । रावणा बाणलें संपूर्ण। देह केला रामार्पण। विश्वमुखें पूर्ण तृप्तीसीं॥११॥ करोनि देहाचें हविर्द्रव्य । विश्वमुखीं दशग्रीव। अर्पितांचि रघुराव। तृप्ति स्वयमेव पैं झाला॥१२॥ म्हणोनियां रावण। घारगीधमुखीं जाण। आपणा विदारवी[१] आपण। श्रीरघुनंदनसुखार्थ॥१३॥ कुळ उद्धरिलें सकळिक। तेणें बिभीषणा हरिख। हर्षयुक्त करितां शोक। बोलों आणिक आदरिलें॥१४॥ पुष्पवाटिकेचें उद्यान। क्षणें विध्वंसी पवन। तेंवी क्षणमात्रें रामें जाण । ससैन्य रावण निवटिला॥१५॥ महामत्तमातंग[२] जैसा। कोणाही नागवे सहसा। रावण मत्त महागज तैसा। राघवेशा आतुंडला॥१६॥ महामत्त वडवानळू। कोणी न शके आकळूं। त्यासी वर्षोनि घन सबळू। अग्निकल्लोळ करी शांत॥१७॥ तेंवी श्रीराममेघेंकरून। रावणाग्नि विझविला पूर्ण। अष्टांगांचे कोळसे जाण। शोभती संपूर्ण रणांगणीं॥१८॥ ऐसें नानापरी बहुत। बंधु पुढें घेवोनि तेथ। बिभीषण विलाप करित। हृदय पिटित निजकरें॥१९॥

श्रीरामांकडून बिभीषणाचे सांत्वनः तें देखोनि रघुनंदन। संबोखीतसे आपण। शास्त्ररीतीं लौकिकवचन। शांतवन अति प्रीतीं॥१२०॥ व्यर्थ न करीं शोकातें। न व्हावें झालें निरुतें[३]। सावध होवोनि निजचित्तें। सांडीं परतें मोहासी॥२१॥ घटामाजी भरलें जळ। त्यांत बिंबलें चंद्रमंडळ। काळें वेंचल्या घटजळ। बिंब तत्काळ हरपलें॥२२॥ त्या बिंबालागीं आपण। शोक करितां दारुण। तेथें श्रमचि उरे जाण। बिंब पूर्ण न ये हाता॥२३॥ घटामाजी बिंब असते। शोक करितां तें भेटतें। तेंवी धरिलिया प्रेतातें। रावण तेथें भेटेना॥२४॥ बिभीषणा ऐक विनंती। शोक करितां तुजप्रती। न भेटे गा लंकापती। सांडीं निश्चितीं भ्रमातें॥२५॥ तूं विवेकसंपन्न राजा। इतरां उपदेश व्हावा तुझा। तो तूं तेथें मोहसमाजा। निमग्न काजा[४] पैं कवण[४]॥२६॥ ज्यासीं होय अवगती। अवश्य त्याची करावी क्षती[५]। उसण्याघायीं जे निमती। ते वंद्य होती सुरनरां॥२७॥ रावणें करोनि ख्याती। समरांगणीं सर्वशक्ती। तुच्छ करोनि देहस्थिती। ब्रह्मस्थिती साधिली॥२८॥ महायोगी कामक्रोध। जिणोनि साधी परमानंद। तेंवी रावणें निजपद। करोनि युद्ध साधिलें॥२९॥ वाणीचा होता दशमुख। तो झाला विश्वमुख। त्याचा करूं नये शोक। निजविवेक विचारीं॥१३०॥ म्हणोनि शोका योग्य रावण। सर्वथा नव्हे नव्हे जाण। तूं बिभीषण सर्वज्ञ। व्यर्थ रुदन सांडी परतें॥३१॥ गेलियाच्या शोक करितां। लागों पाहे मूर्खता। ते सांडोनियां सर्वथा। बंधुस्वधर्मता साधावी॥३२॥

बिभीषणाला रावणाची उत्तरक्रिया करण्यास श्रीराम सांगतात : रावणाचें और्ध्वदेहिक[६]। तुवां करावें आवश्यक। गोत्रज पुत्र निमाले देख। कर्ता आणिक दिसेना॥३३॥ जो देवद्रोही वेदद्रोही। मुख्य ब्रह्मयाचा ब्रह्मद्रोही। त्याचा शोक सर्वथा पाहीं। शास्त्रें नाहीं बोलिला॥३४॥ तूं बिभीषण सविवेक। सांडोनियां दुःखशोक। करीं बंधूचें और्ध्वदेहिक। व्यर्थ दुःख करोनि काय॥३५॥

स तस्य वाक्यैः करुणैर्महात्मा संबोधितः साधुबिभीषणश्च।
आज्ञापयामास नरेंद्रसूनुः स्वर्गार्थमाधानमदीनसत्वम्॥१३॥

रामांच्या उपदेशाने बिभीषण मोहापासून परावृत्तः ऐसें सांवळेनि सुंदरें। बुद्धिबोधप्रबोधचंद्रें।

---

शब्दार्थ : १. फाडून घेई. २. अति मदोन्मत्त हत्ती, ३. खरोखर, ४. कोणत्या कारणाने, का म्हणून, ५. शोक, ६. उत्तरक्रिया.

सूयवंशप्रभाकरें। दशरथकुमरें बोलिलें॥३६॥ जो ईश्वरा ईश्वर। जो योगियांचा योगेश्वर। जो नरेंद्राचा नरेंद्र। तो रघुवीर बोलिला॥३७॥ ज्याचें ऐकतां वचन। उपनिषदां पडे मौन। सद्य[1] चित्त चमत्कारे पूर्ण। समाधान जीवशिवां॥३८॥ तेणें श्रीरामें आज्ञापितां। मोह गेला न दिसे केउता। सावध होऊनि तत्वतां। झाला करिता उत्तरविधी॥३९॥ सत्वाथिला अति सात्विक। बिभीषण परम धार्मिक। श्रीरामवचनें देख। मोह नि:शेख सांडिला॥१४०॥ जेंवी उगवतां दिनमणी। सचंद्र तारा हरपती रजनीं। तेंवी श्रीरामवचनेंकरूनी। मोह तत्क्षणीं पळाला॥४१॥ सावध होउनि मानसीं। अनुसरोनि रामवचनासी। आनंदमय रणभूमीसीं। प्रेतदहनासी होय करिता॥४२॥ स्वर्गादि क्रियेची संस्था। बिभीषण झाला करिता। तंव अंत:पुरीं कळतां वार्ता। आल्या वनिता[2] रावणाच्या॥४३॥

अंत:पुरद्विनिष्पेतू राक्षस्य: शोककर्षिता:। बहुशश्चेष्टमानास्ता: प्रदिग्ध: क्षितिपांसुभि:॥१४॥

रावणस्त्रियांचा आक्रोश: एकी आरडती ओरडती। एकी वक्ष:स्थळें पिटिती। एकी गडबडां लोळती। एकी करिती महाशब्द[3]॥४४॥ एकी केश तोडिती। एकी कान ओरबडती। आंग भूमीवरी टाकिती। मस्तक हाणिती भूमीसीं॥४५॥ बहुसाल करिती दु:ख। हंबरडे हाणिती देख। जेंवी गाय वधितां श्वपाक[4]। अलौकिक आक्रंदे॥४६॥

स्त्रीजीवनांत पतीचें महत्त्व : पति स्त्रियांचे जीवन। पति स्त्रियांचें सौभाग्य जाण। जीवें जातां पतीवीण। प्रेतरूप जाण सर्वथा॥४७॥ पति कांतेचें निजवित्त। पति कांतेचे भोग समस्त। पतीवीण ते उपहत[5]। वृथा जीवित तियेचें॥४८॥ पतीवीण वृथा आचार। पतीवीण वृथा विचार। पतीवीण वृथा शरीर। भोगोपचार ते वृथा॥४९॥ पतीवीण वृथा योग। पतीवीण वृथा भोग। पतीवीण कैंचा संग। पतिदाघ[6] अनिवार॥१५०॥ पतीवीण कैंचे सुख। पतीवीण कैंचा हरिख। अल्पविषय स्फुरतां देख। आकल्प[7] नरक भोगावे॥५१॥ पतीवीण कवणेंसीं रती। पतीवीण कवणेंसीं प्रीती। पतीवीण नरकप्राप्ती। विषय चित्तीं आठवत॥५२॥ ऐशापरी दु:खे दु:खिता। मृतप्राय समस्ता। मिळालिया रावणवनिता। तळमळित विलापें॥५३॥ पुच्छ तुटलिया सापसुरळी। काटा रुतल्या सर्पकपाळीं। जळावेगळी मासोळी। तेंवी सकळी तळमळती॥५४॥

बहुमानं परिष्वज्य काचिदेनं रुरोद ह। चरणौ काचिदालिंग्य काचित्कंठेऽवलंब्य च॥१५॥
उद्धृत्य च भुजं काचिद्भूमौ संपरिवतति। हतस्य वदनं दृष्ट्वा काचिन्मोहमुपागता॥१६॥

रावणाचा मृतदेह पाहून स्त्रियांचा विलाप: पुष्पवाटिकेमाजी मातंग[8]। रिघोनि वन विध्वंसी सांग। तेंवी श्रीरामबाणें चांग। रावणअंग विध्वंसिलें॥५५॥ रणीं धुळीमाजी लंकापती। पडिला देखोनि निश्चितीं। रावणांगना आक्रंदती। शोक करिती महादु:खें॥५६॥ जें चुंबिती नित्य वदन। त्यातें देखोनि प्रेतवर्ण। निढळीं निढळ मेळवून। करीत चुंबन मुखाचें॥५७॥ एकी देती आलिंगन। एकी कर उचलिती जाण। हृदयीं धरिती आलिंगून। करिती मर्दन निजकुचा॥५८॥ एकी शेजारीं निजती। उर्शी बाहु घालिती। मागुतेनि लंकापती। शयनस्थिती केंवी भेटे॥५९॥ चरण चुरावया धांवती एक। पादसंवाहन करिती एक। युद्ध करितां दशमुख। रणरंगी देख कष्टला॥१६०॥ रणीं भिडतां श्रीरामासीं। बहुत श्रम रावणासीं म्हणानि रडती कांतासीं। नाहीं शोकासी मर्यादा॥६१॥ पडिला देखोनि दशवदन। म्हणती चुड्यांसी पडिलें खान[9]। ओढवलें मस्तकवपन। मोकळे कान दुर्दशा॥६२॥ देहलोभें आक्रंदती। कानकेशांलागीं रडती। जेणें श्लाघ्य त्रिजगती। देह न वेंचिती त्यासवें॥६३॥ दीर्घस्वरें

शब्दार्थ : १. तत्काळ, २. स्त्रिया, ३. शंखध्वनी, ४. चांडाळ, ५. नाश झालेली, ६. पतिवियोगाचा ताप, ७. नित्य. ८. हत्ती, ९. शून्य.

आक्रंदोन। अट्टहास्यें करिती रुदन। कानकेशां पडिलें खान। वैधव्य पूर्ण ओढवलें॥६४॥ रणीं करोनि रणख्याती। सायुज्य लाधला रघुपती। आम्हां सांडोनि लंकापती। साधिली मुक्ती निजांगें॥६५॥ मोकलोनियां सकळांसी। गमन केलें निजपदासी। आम्हां निरविलें वैधव्यासीं। नापितापासीं बैसविलें॥६६॥ पति निघोनि गेला पुढें। मागें कान केशां रडे। देहलोभाचें बळ गाढें। नाहीं धडपुढें वैराग्य॥६७॥ जेणें सकळ भोग भोगिती। त्यासीं देह देता रडती। देहलोभाची ऐसी जाती। रांडवा होती देशभरी॥६८॥ आपण स्वयें अमंगळ। प्रेतरूपी पैं केवळ। त्या मानिती ब्राह्मणविटाळ। दोष अमंगळ करिती पैं॥६९॥ त्यांचेनि हातें पाचन। तें केवळ अमेध्य जाण। करिती जें सेवन। पवित्रपण तें व्यर्थ॥१७०॥ ब्राह्मणहस्तीं जें झालें। तें तंव जनीं निंद्य केलें। प्रेतरूपें जें झालें। पवित्र मानिलें सर्वत्रीं॥७१॥ ऐसी जनाची विपरीत गती। निंद्य तेंचि वंद्य करिती। सुवासिनीतें उपेक्षिती। शुचिर्भूती विधवांची॥७२॥ आधींच अमंगळवृत्ती। आणि काशी द्वारका करिती। दुणा[1] अभिमान वाढला चित्तीं। ते वंद्य होती कैसेनि॥७३॥ हें मी बोलिलों प्रसंगता। क्षोभ न मानावा श्रोतां। धर्मशास्त्रीं हे कथा। सत्य सर्वथा ऐसी आहे॥७४॥ ऐसिया रावणवनिता। पतिदु:खें अति दु:खिता। देहलोभें तळमळितां। नव्हे विरक्तता देहासीं॥७५॥ तंव पातली मंदोदरी। आक्रंदती दीर्घ स्वरीं। पति धरोनि अंतरीं। आली सुंदरी जवळिकें॥७६॥ एका जनार्दना शरण। श्रोतीं व्हावें सावधान। मंदोदरीचें सहगमन। कृपा करोनि परिसावें॥७७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रावणवनिताविलपनं नाम चतु:षष्टितमोऽध्याय:॥६४॥ ओंव्या॥१७७॥ श्लोक॥१६॥ एवं॥१९३॥

## अध्याय पासष्टावा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नम: ॥

### मंदोदरीचे सहगमन

ऐशा रावणाच्या वनिता। अतिशोकाकुळिता। विलाप करिती समस्ता। दु:खाक्रांता रणरंगीं॥१॥ मंदोदरी आली तेथ। अति दु:खें दु:खार्दित। पडिला देखोनि निजकांत। विलाप करीत आक्रोशें॥२॥

तासां विलपमानानां तदा रावणयोषिताम्। ज्येष्ठपत्नी प्रिया दीना भर्तारं समुदैक्षत॥१॥

दशग्रीवं हतं दृष्ट्वा रामेणाक्लिष्टकर्मणा। पतिं मंदोदरी तत्र कृपणं पर्यदेवयत्॥२॥

मंदोदरीकृत रावणशची स्तुती व शोक-विलाप : विष्णुसंभूत जे स्वयें। रचिली स्वहस्तें देवें। चराचर मोहातें पावे। रूप स्वभावें देखतां॥३॥ जो त्रिकाळ आत्मज्ञानी। तो मोहला शूळपाणी। ओळखवेना निजपत्नी। शंकर मनीं वेडावला॥४॥ अकळ[2] भगवंताची माया। अनन्यरूपें रचिली तया। रावणातें भुलवावया। आणि जाया मंदोदरी॥५॥ ते रावणाची ज्येष्ठ पत्नी। स्वयें सतीशिरोमणी। आली रणभूमि ठाकोनी। पति लक्षोनि मंदोदरी॥६॥ निजपति रुधिरोक्षित[3]। विसंज्ञ पडिला रणांत। देखोनियां विलाप करित। प्रताप सूचवि पतीचा॥७॥ जो अनुज[4] कुबेराचा। पढियंता गण शिवाचा। त्रैलोक्यीं प्रताप तयाचा। तो बाणीं रामाच्या पडियेला॥८॥ जेणें आंदोळिला कैलास। प्रसन्न केला महेश। तो रणीं पडला क्षितीश। सांडूनि आस रणरंगी॥९॥ आत्मलिंग मातेकारणें। निमेषगती आणिलें जेणें। तेणें शयन केलें रावणें। श्रीरामबाणें करोनियां॥१०॥ करोनियां महख्याती। बंदी

शब्दार्थ : १. दुप्पट, २. अगम्य, ३. रक्तबंबाळ, ४. धाकटा बंधू.

घातला सुरपती। मंडळवर्ती नित्य खालती। तो लंकापती रणीं पहुडला ॥११॥ नित्य ओळंगती सुरवर। चळीं कांपती ऋषीश्वर। भेणें सेविती गिरिकंदर। तो दशवक्त्र रणीं पहुडला ॥१२॥ जिचेनि नांवें विश्व सुखी। जे विश्वमाता जानकी। ते हरिली एकाएकीं। झालासि लोकीं जगनिंद्य ॥१३॥ या कारणें समग्रीं। प्रहस्तादि मंदोदरीं। सकळ प्रधान थोरथोरीं। नानापरी शिकविले ॥१४॥ इंद्रजित तुझा ज्येष्ठ कुमर। बंधु कुंभकर्ण महावीर। मानिलें नाहीं त्यांचें उत्तर। बहुप्रकार शिकविती ॥१५॥ धर्मात्मा बिभीषण। युवराजा बंधु जाण। हितोपदेश सांगतां पूर्ण। केलें ताडण लत्ताघातें ॥१६॥ तेंचि हित झालें तयासीं। शरण गेला तो रामासी। रामें आश्वासिलें प्रीतीसीं। राज्याभिषेकासी करोनियां ॥१७॥ बंधु रामा शरण गेला। तो स्वराज्यें सुख पावला। तूं नायकसीच बोला। तेणेंचि झाला घात तुझा ॥१८॥ जेणें देहें दशशिरी। कैलासमंदरमेरुशिखरी। क्रीडत होता प्रीतीं थोरी। तो गीधघारीं उचलिला ॥१९॥ चैतन्यवनीं नंदनवनीं। भोग भोगिले सुरभुवनीं। तें शरीर रणांगणीं। पक्षिश्रेणी लुंछिती[1] ॥२०॥ नानापरी आक्रंदतां। न बोलसी तूं लंकानाथा। काय लागली सुषुप्ति[2]अवस्था। कीं गेलासी तत्वतां शिवार्चना ॥२१॥ श्रीरामाच्या निजबाणीं। करोनि देहाची भंगाणी[3]। मोक्ष साधिला रणांगणीं। बळेंकरोनि लंकेशा ॥२२॥ मी तुझी निजकांता। दुःखसागरीं तळमळतां। मज सांडोनि निजमोक्ष घेतां। तुज वंचकता[4] लागेल ॥२३॥ पुरुषार्थ चुतर्विध। त्यांत पहिले तीन प्रसिद्ध। स्त्रियेचा भाग विशुद्ध। असे सिद्ध शास्त्रामांजी ॥२४॥ ऐसें न म्हणें लंकानाथा। अवंचक जे सर्वथा। त्यांसी उपेक्षोनियां जातां। परमार्थ तत्वतां हा नव्हे ॥२५॥ तरी तूं आमुचा भ्रतारू। तूंचि आमुचा सद्‌गुरू। तूंचि आमुचा ईश्वरू। तुझेनि संसारीं सुखरूप ॥२६॥ तुझेनि आम्हां इहलोक। तुझेनि आम्हां परलोक। तुझेनि आम्हां मोक्षसुख। देहदुःख जेथें नाहीं ॥२७॥

**बिभीषणाला मंदोदरीचे सांत्वन करण्यास श्रीराम सांगतात:** ऐसा विलाप बहुतां रीतीं। मंदोदरी आक्रंदती। तें देखोनि रघुपती। निजचित्तीं कळवळला ॥२८॥ पाचारोनि बिभीषण। सांगतसे रघुनंदन। भ्रातृभार्येचें शांतवन। तुवां आपण करावें ॥२९॥ महासती पतिव्रता। मंदोदरी अति दुःखिता। तिसी शांतवोनि आतां। करीं तत्वतां संस्कार ॥३०॥

एतस्मिन्नंतरे रामो बिभीषणमुवाच ह। संस्कार क्रियतां भ्रातुः स्त्रियश्चैता निवर्तय ॥३॥
तमुवाच ततो धीमान्बिभीषण इदं वचः। विमृश्य बुद्ध्या तत्त्वज्ञो धर्मार्थसहितं वचः ॥४॥

ऐसें श्रीरामाचें वचन। ऐकतांचि बिभीषण। भक्तांमाजी अग्रगणी जाण। तो तत्त्वज्ञ रामभजनें ॥३१॥ जो इहलोक परलोक। उभयसंस्था जाणे देख। तत्वज्ञान अति सुटंक[5]। ज्ञानटिळक ज्ञानियाचा ॥३२॥ लाहोनि रामआज्ञापन। मंदोदरीसी विचक्षण। बोलता झाला आपण। सावधान अवधारा ॥३३॥

**बिभीषणाचा उपदेश :** तूं सती पतिव्रता। मंदोदरी विष्णुसंभूता। व्यर्थ खेद करणें चित्ता। उचित सर्वथा हें नव्हे ॥३४॥ असलियाचा संतोष जनीं। गेलियाची हानी मानी। हे हर्ष शोक जनीं दोनी। ते ज्ञाते मनीं न धरिती ॥३५॥ प्राप्तविषयें सुख भोगावें। अप्राप्तविषयें दुःख पावावे। तरी ते प्राकृत जाणावे। न संभवे सतीत्वा ॥३६॥ तुझे सतीत्वाची ख्याती। विस्तारली त्रिजगतीं। ते तूं मढें घेवोनि हातीं। दुःखावर्तीं निमग्न ॥३७॥ जेव्हां आदरिला शोक। तेव्हांचि सतीत्व गेलें देख। आकल्पवरी करितां दुःख। दशमुख तरी नये ॥३८॥ रडत पडत शोक करीत। अपूर्ण कामें तळमळित। मढें धरोनि आगीं निघत। अधःपात[6] दोघांसी ॥३९॥ प्रेत धरोनि आगीं रिघती। त्या प्रेतपिशाच होती। जे का भोगीं अवतरती। मान मागती

शब्दार्थ : १. तोडतात, २. गाढ झोप, ३. नाश, ४. कपट, ५. निर्मळ, ६. नरकवास.

बहुविध ॥४०॥ ऐसी एक गती। एक आणिकचि स्थिती। पति निमाला मध्यरातीं। त्या नेणती देहभ्रमें ॥४१॥ मध्यरात्रीं निमाला पती। दिवसा मढें मिरवे सती। पति गेला हातोहातीं[1]। मढ्याप्रती आगीं रिघे ॥४२॥ जरी देहचि पति होये। तरी तो तैसाचि पडिला आहे। गेला गेला म्हणती काये। नेणती सोये तयाचि ॥४३॥ एकी शुद्धसत्त्वात्मका। पति चैतन्य जाणोनि देखा। सांडून देहाचा आवांका। सायुज्य देखा साधिती ॥४४॥ त्या त्रैलोक्यासीं मंडण[2]। येरांसी दु:ख दारुण। स्वयें भोगिती अध:पतन। करिती भ्रमण पिशाचत्वें ॥४५॥ शुद्धस्वरूप नेणे सती। मढें धरोनि बहुसाल मरती। त्यांत तुझी कवण गती। न कळे निश्चितीं आम्हांसी ॥४६॥ श्रीरामहस्तें मरतां । अवघ्या त्रैलोक्या देखतां। सायुज्य झालें लंकानाथा। कुळासहित उद्धरिला ॥४७॥ त्याचा शोक करितां देख। अवघें विश्व म्हणेल मूर्ख। तूंही पाहें निजविवेक। दशमुख कवण तो ॥४८॥ जरी देह म्हणसी रावण। तरी तो तैसाचि आहे जाण। म्हणसी त्याहून विलक्षण। त्याचें ज्ञान तुज नाहीं ॥४९॥ इंद्रियेंचि म्हणसी पती। स्वत: चैतन्य तीं नव्हेती। ज्याच्या ठायीं चाळकशक्ती। तो निश्चितीं वेगळाचि ॥५०॥ ऐसें स्थूळ सूक्ष्म कारण। चौथा देह महाकारण। चाळक त्याहूनि भिन्न। न कळे चिन्ह तयाचें ॥५१॥ याचिलागीं योग करिती। याचिलागीं याग अनुष्ठिती[3]। उग्र पुरश्चरणें करिती। मंत्र जपती यालागीं ॥५२॥ व्रत तप आणि दान। याचिलागीं तीर्थाटन। नौष्ठिक ब्रह्मचर्य पूर्ण। यालागीं जाण आचरती ॥५३॥ याचिलागीं क्षेत्रवास। याचिलागीं संन्यास। संसारावरी घालून कास। होती उदास यालागीं ॥५४॥

रामांच्या निजस्वरूपाची ओळख करून घ्यावी: म्हणोनि चाळक तो नेणतां। सकळ साधनें होती वृथा। याकारणें तुवां आतां। चाळक तत्वतां लक्षावा ॥५५॥ लक्षिलिया निजचाळक। नि:शेष नासे द्वंद्वदु:ख[4]। स्वयें ब्रह्मत्व ठसावे देख। अगाध सुख पाविजे ॥५६॥ आतां असोत या गोष्टी। तुज रावणाची अवस्था मोठी। तरी आतां उठाउठीं। राम जगजेठी उडवील ॥५७॥ नेणसी रामाचें महिमान। वृथाचि करिसी विलपन। राम परमात्मा आपण। अलक्ष पूर्ण सुरसिद्धां ॥५८॥ राम स्रष्ट्यातें उपजविता। राम जीवातें जीवविता। राम काळाचा संहर्ता। राम सर्वथा अलक्ष ॥५९॥ राम इंद्रिया चेतविता। राम प्राणांतें चाळिता। राम मनातें कल्पिता। राम बोद्धव्यता बुद्धीची ॥६०॥ राम चित्ताचें चेतव्य। रामें अहंकारा अहंभाव। अंत:करणीं आवरणभाव। जाण स्वयमेव श्रीरामें ॥६१॥ सप्तधातु सप्तकोश। रामें वाढती सावकाश। रामेंवीण सकळ ओस। हें कोणास कळेना ॥६२॥ मृत्तिकेवेगळा नाहीं घटु। तंतूवेगळा नाहीं पटु[5]। अक्षरावीण न घडे पाठु। जाण स्पष्ट महासतिये ॥६३॥ जो जो घट निपजे। गगन त्या सबाह्य सहजें। तेंवी प्रतिमा रघुराजें। निजांगें व्यापिजे निपजतां ॥६४॥ जेंवी सुवर्णी अलंकार। तेंवी श्रीरामीं चराचर। तो प्रत्यक्ष असतां रघुवीर। मोहें अपार आक्रंदसी ॥६५॥

मंदोदरीस बोध : ऐसें बिभीषणें सर्वज्ञें। सांगतां हितवचनें। तेंचि बाणलें तत्क्षणें। निजज्ञानें अति चतुर ॥६६॥ जेंवी मेघमुखींचें उदक। पडतांचि एकाएक। वरीच्यावरी चातक। झेलून देख पैं नेत ॥६७॥ उगवतां रजनीकर। ताप निरसोनि समग्र। परमामृतें चकोर। तृप्ति साचार पावती ॥६८॥ बिभीषणवचनेंकरीं। मदुर गिरा अति कुंसरीं[6]। प्रबोधिली[7] मंदोदरी। दु:खसागरीं पैं बुडतां ॥६९॥ येरी होवोनि सावधान। नमियेला बिभीषण। भली दिधली आठवण। होसी सर्वज्ञ रामभक्त ॥७०॥ तुझेनि बोलें मज आतां। आठवली पूर्वकथा। याचि रीतीं जनकदुहिता[8]। श्रीरामसंस्था सांगितली ॥७१॥ परी मोहाचें बळ दुर्धर। आठवों नेदी

**शब्दार्थ :** १. एकाएकी, २. भूषण, ३. आचरतात, ४. द्वैताची पीडा, ५. वस्त्र, ६. कौशल्याने, ७. उपदेशिली, ८.सीता.

विचार। तुझा जो कां वचनभास्कर। किरणें खडतर तयाचीं ॥७२॥ त्यांचा पडतांचि प्रकाश। मोहतमाचा ऱ्हास। झाला न लागतां निमेष। हृदयकोश उजळला ॥७३॥

रमंते योगिनी यत्र सत्यानंदे चिदात्मनि। इति रामदेनासौ परब्रह्माभिधीयते॥७॥

राम परामात्मा चिद्धन। ऐसें निश्चिया आलें पूर्ण। चराचरीं रघुनंदन। अनवच्छिन्न[1] साक्षित्वें ॥७४॥ याच रीतीं रावण। सर्वगत सनातन। जाणोनियां रघुनंदन। निजशिरींकरून पूजिला ॥७५॥ सायुज्याचा रघुराजा। निजशिर छेदोनि वोजा। करितां प्रीतीं लक्षपूजा। वीस भुजां उल्लास ॥७६॥ दुर्जय कष्टेंकरोनि जाण। सायुज्य साधिलें आपण। तो उठवितां दशानन। लागेल संपूर्ण स्वामिद्रोह ॥७७॥ निजदेहो रावण। करोनियां रामार्पण। सायुज्य पावला परिपूर्ण। तेंचि आपण साधावें ॥७८॥

देह रामार्पण करून पतीच्या मार्गाने जाण्याचा मंदोदरीचा निश्चय: जेणें मार्गे निजपतीं। साधियेली निजभक्ती। मीही साधीन त्याचि रीतीं। देह रघुपतीं अर्पीन ॥७९॥ आतां उठविलिया रावण। मरण न चुके जाण। तेणें काळें रघुनंदन। सर्वथा जाण भेटेना ॥८०॥ श्रीरामदृष्टीपुढें मरण। त्यापुढें तुच्छ ब्रह्मसदन। स्वर्गादिकां पुसे कोण। तें आजि जाण सांपडलें ॥८१॥ श्रीरामदृष्टीपुढें देहपतन। ब्रह्मसायुज्य तेणें पूर्ण। तें सांडूनि वांछी आन। नरक दारुण तयासीं ॥८२॥ सांडोनियां श्रीरघुनाथा। देहलोभें विषय भोगितां। अनिवार नरकावस्था। भोगितां कल्पांतीं सरेना ॥८३॥ म्हणोनियां पतिव्रता। अनुसरोनियां तत्वतां। देह त्यागोनियां आतां। निजकांता विनटेन ॥८४॥ ऐसा करोनि निर्धार। पुढें चालिली सुंदर। नमूनि साष्टांगीं रघुवीर। आनखाग्र[2] पाहिला ॥८५॥ सांग अवलोकोनि रूपडें। पुनः पुनः वाडेंकोडें। मनीं धरिलें प्रेम गाढें। निजनिवाडें सुंदरी ॥८६॥ येथें क्षणें श्रोते कोपती। ज्यासी नाहीं वर्णव्यक्ती। तो अनिवार निश्चितीं। आनखाग्रस्थिती तेथें कैंची ॥८७॥ ऐसे आक्षेपीं उत्तर। श्रोते परिसोत चतुर। राम रूपातीत पर। तोचि अवतार धरीतसे ॥८८॥ अबळा भोळे नेणती। कैंवी अव्यक्तीं प्रवेशती। म्हणोनि राम आला व्यक्ती। चिदचिन्मूर्ती द्विबाहु ॥८९॥ त्यातें सांग अवलोकून। केलें प्रदक्षिणा नमन। तीर्थ घेतलें प्रार्थून। पुसे आज्ञापन सतीत्वा ॥९०॥ तंव श्रीरामतेजें विलक्षण। क्षणैक परतवूनि प्राण। बोलतां झाला पैं रावण। स्वहितवचन निजकांतें ॥९१॥ दुकाळिया बुभुक्षितासी। ओगरिलें[3] असतां षड्रसांसी। जेंवी न पुसे कोणासी। घेत कवळासी तांतडी ॥९२॥ तेंवी श्रीरामदृष्टीं चोखट। विस्तारिलें सायुज्यताट। तेथें आलीस अवचट। तरी यथेष्ट साधावें ॥९३॥ नश्वर देहाचियेसाठीं। कैवल्य येथें उठाउठीं। पडली स्वानंदमिठी। राम जगजेठी ओळला[4] ॥९४॥ त्या आनंदातें अनुसरोन। श्रीरामातें धरून। अविलंबें करोनि जाण। स्वहित आपण मागावें ॥९५॥ चित्तासीं अति चंचळता। बुद्धीसीं नाहीं स्वस्थता। तूं सती पतिव्रता। विलंब सर्वथा न करावा ॥९६॥ बंधु रामासी शरण गेला। सुवर्णाचे नगर पावला। विरोधोनि म्यां वहिला[5]। रामसायुज्य लाधलों ॥९७॥ मज उद्धरोनि रघुनाथें। दिधलें स्वसुखसाम्राज्यातें। तिष्ठत राहिलोंससें येथें। प्रतीक्षा करीत पैं तुझी ॥९८॥ तूं तंव अवंचक पतिव्रता। भगवद्बुद्धीं निजकांता। भजिन्नलीस यथार्थता। कृपा रघुनाथा तेणें आली ॥९९॥ ते कृपेचें आयतन[6]। देहीं देहभाव सांडून। विदेहत्वेंकरोनि जाण। सायुज्य आपण साधावें ॥१००॥ इतुकें बोलोनि रावण। निवांत राहिला आपण। आनंदमय त्रिभुवन। साक्षी दशानन वदतांचि ॥१॥ मंदोदरीचें सतीत्व। श्रीरामाचें निजवैभव। ऐकोनियां अति अपूर्व। त्रैलोक्यीं सर्व विस्मित ॥२॥ रामनामाच्या दीर्घ स्वरें। खेचरें भूचरें वनचरें। दानवें मानवें समग्रें। जयजयकारें गर्जती ॥३॥

---

**शब्दार्थ :** १. परिच्छेदरहित, २. नखाग्रापासून मस्तकापर्यंत, ३. वाढले, ४. प्राप्त झाला, ५. सत्वर, ६. स्थान.

मंदोदरी आनंदाने सहगमनाची तयारी करते : येरीकडे महासती। सहगमनाची आइती[1]। करिती झाली अति प्रीतीं। आनंद चित्तीं अनिवार॥४॥ सहस्रसंख्या संभार। चंदनकाष्ठें बिल्वागर। तुळसीकाष्ठें अति पवित्र। वेगवत्तर आणिलीं॥५॥ देवोनि सतीत्वाचीं वाणें। श्रीराम कवळी निजध्यानें। करावया निजधामा पेणें। प्रेमानुसंधानें डुल्लत॥६॥ दहनरचन अति वोजा। शयन करविलें वीस भुजां। शिरांचा विखुरला जो पुंजा। दशकंठभाजा एकवटी॥७॥ तंव अपूर्व वर्तलें तेथें। निजशिरीं श्रीरामातें। लक्षपूजा पूजिलें होतें। तीं समस्तें न दिसती॥८॥ विस्मित झाली मंदोदरी। शिरें न दिसतां सुंदरी। होउनि अत्यंत घाबरी। विचार करी शिरांचा॥९॥

ते पाहून बिभीषण स्मित करून मंदोदरीचे अज्ञान प्रकट करतो: देखोनियां तिचें चिन्ह। हांसिन्नला बिभीषण। श्रीरामाचें महिमान। अद्यापि ज्ञान तुज नाहीं॥११०॥ जें अर्पिलें श्रीरामासी। तें केंवी परते जळावयासी। मंदोदरी ऐसी कैसी। श्रीराममहिमेसीं अनोळख॥११॥ जें श्रीरामासी मिनलें। त्याचें नाम रूप तेव्हांचि गेलें। मग प्रयत्नीं शोधिलें। तरी परतलें दिसेना॥१२॥ अलंकार हरपे सुवर्णीं। तेंवी पतिशिरें रघुनंदनीं। सर्वथा गेली हारपोनी। तीं कैसेनि दिसतील॥१३॥

ते ऐकून त्यांस नमस्कार करून चितेवर देहार्पण: ऐकोनियां तें वचन। केलें बिभीषणासी नमन। करोनियां रामस्मरण। केलें शयन पतिसेजे॥१४॥ विधियुक्त उपासन। दक्षिणहस्तें-करून। मंत्राग्नि चेतविला पूर्ण। देदीप्यमान तेजस्वी॥१५॥ चैतन्याग्नि अंतरीचा। बाह्य प्रदीप्त उपासनेचा। भडका उठिला अग्नीचा। प्रकाश दोहींचा एकचि॥१६। जेंवी अग्नीमाजी सुवर्ण। तद्रूपतेसीं देदीप्यमान। भासे अति सुलक्षण। मंदोदरी जाण तेंवी दिसे॥१७॥ पतिसंगें होतें शयन। ते वेंगीं बैसली उठोन। बोलती झाली आपण। श्रीराममहिमान तें ऐका॥१८॥

अग्नीत उठून बसून ती राममहिमा सांगते: निजानंदेंकरोनि वहिली। जनकदुहिता अनुवादली। प्रयाणकाळीं बोलली। पतिव्रता वहिली सुलोचना॥१९॥ हेंचि वदला बिभीषण। राम मानवी नव्हे जाण। राम परमात्मा आपण। राम चिद्घन चिन्मूर्ति॥१२०॥ राम चैतन्याची कळा। राम जीवाचा जिव्हाळा। राम प्रेमाचा पुतळा। पावली कळा मज आतां॥२१॥ तीर्थ घेवोनि प्रदक्षिणा। करोनि चरणअवलोकना। करिता सबाह्य ओतला जाणा। देहीं देहपणा। हरपली॥२२॥ मुसेचें सांडूनि मेण। रस ओतिजे परिपूर्ण। तेंवी मज सबाह्य जाण। श्रीरघुनंदन ओतिला॥२३॥ माझे अंगीचें रोमकूप। श्रीराम तेजें देदीप्य।अग्नीचा जो दाहक प्रताप। नाहीं अल्प बाधित मज॥२४॥ हेंचि नवल सांगूं काये। श्रीरामें धरिली धरा राहे। श्रीराम जीवें जीवन पाहें। जीववितांहें सर्वांसी॥२५॥ श्रीरामतेजेंकरोनि जाण। स्वप्रकाशें देदीप्यमान। त्रिजगतीं हुताशन। करी पाचन नेमाचें॥२६॥ श्रीराम सामर्थ्यें वायु जाण। निजमर्यादा करी चळण। अंतरीं प्राणवृत्ती पूर्ण। बाह्य संचरण यथाकाळें॥२७॥ श्रीरामाचे कडवसा[2]। शून्यत्वें ठावो आकाशा। जाणितलें राघवेशा। चिदाभासा चिद्घन॥२८॥ श्रीराम घ्राणाचें निजघ्रेय। तेंचि सुवासीं सौरभ्य[3] होय। निजसौरभ्येंचि स्वयें पाहें। घेत आहे निजावडी॥२९॥ राम रसाचा अध्यक्षु। राम रसनेचा निजचक्षु। रसज्ञपणें अति दक्षु। अलौकिक रसभोक्ता॥१३०॥ सकळ गोडियांचे जें गोड आहे। तें श्रीरामचि पैं स्वयें। जो सेवितां लवलाहें। रसना होये सर्वांग॥३१॥ श्रीरामातें अवलोकितां। रूपचि हरपे वस्तुतां। सकळ स्वरूपें प्रकाशिता। पारखी स्वतां स्वरूपाचा॥३२॥ स्पर्शेंद्रियें आनंद। श्रीरामचळणें प्रसिद्ध। आनंदा निजानंद। स्पर्शनबोध श्रीराम॥३३॥ प्रणवाचा आदिवेद। नादा भुलविता जो शब्द। निःशब्द जो निजानंद। श्रवणाबोध श्रीरामें॥३४॥ त्रिविध जो कां अहंकार।

शब्दार्थ : १. तयारी, २. छायेत, ३. सुवास.

पंचीकरणप्रकार। राम त्याचाही अंतर। तत्वविचार जेथें निमे॥३५॥ गुणसाम्य ऐसी अवस्था ती रामगुणेंचि वस्तुतां। महत्त्वाच्या निजसत्वा। राम तत्वतां प्रकाशक॥३६॥ ज्यातें म्हणती हिरण्यगर्भ। हें चराचर ज्याचा गर्भ। तो श्रीरामाचा निजगर्भ। अनुपम शोभा जयाची॥३७॥

असे मंदोदरीचे बोलणे ऐकून तिच्या मस्तकी स्वर्गस्थांची पुष्पवृष्टी : ऐसें बोलतां सुंदरी। पुष्पवृष्टि सुरवरीं। केली मंदोदरीचे शिरीं। अति गजरीं अति प्रीतीं॥३८॥ त्राहाटिल्या सुरदुंदुभी। जयजयकार झाला नभीं। देवांगना निरालंबी[1]। आनंदगर्भी नाचती॥३९॥ येरीकडे सती आपण। अग्नीमाजी लोटांगण। श्रीरामासी करोनि जाण। मागुतें स्तवन आदरिलें ॥१४०॥

मंदोदरीकृत रामस्तुती : राम गतीची निजगती। राम चेतनेची चिच्छक्ती। राम विश्रांतीसीं विश्रांती। अतर्क्यगती रामाची॥४१॥ राम नादाचा अनादिनाद। राम शब्दाचा निजशब्द। राम आनंदाचा निजानंद। राम महाबोध बोधाचा॥४२॥ राम चेतनाचें चक्षु। राम इंद्रियांचा अध्यक्षु। विषयसुखाचा मूळवृक्षु। राम चक्षु चक्षुंचा॥४३॥ राम स्वर्गाचा आदिस्वर्ग। राम अपवर्गाचा[2] अपवर्ग। राम जीवशिवांचा योग। राम सुलभ सुलभत्वें॥४४॥ राम सुखाचें सोलींव सुख। रामविस्मरणीं अगाध दुःख। ऐसें बोलतां एकाएक। निजदेह देख विसरली॥४५॥

अग्नीत स्वत: देहसमर्पण: मौनेचिकरीं महासती। लोटांगण रघुपती। घालोनियां अति प्रीतीं। सांडिलें निश्चितीं कलेवर॥४६॥ आगीं कापुरा योग होतां। तद्रूप होय एकात्मता। तेंवी देहत्यागें रावणकांता। झाली तत्वतां श्रीराम॥४७॥ लोकीं प्रथा[3] ऐसी। सहगमन नाहीं मंदोदरीसीं। सतीत्वाची ख्याति जिसीं। ते वैधव्येंसीं केंवी राहे॥४८॥ अवघीं केला जयजयकार। वानरभारीं आल्हाद थोर। सती पतिव्रता पवित्र। केलें चरित्र जगद्वन्द्य॥४९॥ राक्षसांच्या कांता। आणि रावणाच्या वनिता। येरी येरीतें वाणें देतां। झाल्या प्रवेशत्या अग्नीमाजी॥१५०॥

बिभीषणाकडून सर्वांची विधियुक्त उत्तरक्रिया: धर्मात्मा श्रीरामभक्त। बिभीषण अति विरक्त। उत्तरविधी साद्यंत। केली विधियुक्त बंधूसी॥५१॥ सकलांचें मनोगत। सिद्धि पावलें समस्त। अवघे झाले आनंदभरित। नामें गर्जत अति गजरें॥५२॥

रामोपि सह सैन्येन सुग्रीव सहलक्ष्मण:। हर्षं भेजे रिपुं हत्वा वृत्रं वज्रधरो यथा॥६॥

राम लक्ष्मण सुग्रीव जाण। अंगद जांबुवंत वायुनंदन। मुख्य अग्रणी हनुमंत जाण। चाळक संपूर्ण रामाचा॥५३॥ अवघे झाले आनंदभरित। सुरकार्य झालें समस्त। निवटिला लंकानाथ। साधुसंतविरोधी॥५४॥ एका जनार्दना शरण। मंदोदरीचें सहगमन। झालें अति गजरें करून। ख्याति दारुण सतीत्वाची॥५५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धाकांडे एकाकारटीकायां मंदोदरीसहगमनं नाम पंचषष्टितमोऽध्याय:॥६५॥ ओंव्या॥१५५॥ श्लोक॥६॥ एवं॥१६१॥

## अध्याय सहासष्टावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### बिभीषणाला राज्याभिषेक

जो सकळलोकघातक। सकळधर्मावरोधक। सत्कर्मविच्छेदक। तो रामें दशमुख निवटिला॥१॥ शेतीं केली वाफधांवणी[4]। जेंवी कृषीवल[5] सुखावे मनीं। तेंवी निवटून दशाननी। रघुनंदनीं उल्लास॥२॥ दीक्षित याग आचरती। दुःसाध्य यज्ञ संपादिती। साधोनि केली पूर्णाहुती। पावती विश्रांती निजसुखें॥३॥ तेंवी रामें करोनि ख्याती। सेतु बांधोनि अपांपती। राक्षसांची करोनि शांती। लंकापती निवटिला॥४॥ श्रीराम याज्ञिक चोखट। रणभूमि तेचि यज्ञवाट। काळानळ अति श्रेष्ठ। हव्यवाट[6] आव्हानिला॥५॥ सुग्रीवादि हनुमंत। ऋत्विज सेनापति समस्त।

शब्दार्थ : १. आकाशांत, २. मोक्षाचा, ३. प्रसिद्धी, ४. वाफसा करणे, ५. शेतकरी, ६. अग्नी.

बिभीषण साक्षी तेथ। कर्म सांगत चुकलें तें ॥६॥ परिसमूहन सडा होत। परिस्तरण शस्त्रें अद्‌भुत। पर्युक्षण अस्त्रांचें तेथ। अति आरक्त रुधिराचा ॥७॥ श्रीराम नेटाका यजमान। हविर्द्रव्य[1] राक्षससैन्य। स्रुवा बाणाचा सुलक्षण। देत अवदान काळानळीं ॥८॥ तेथें यंत्राचें मंत्रघोष। सारी मारी पाडी देख। न मम म्हणतां रघुकुळटिळक। काळानळ देख स्वीकारी ॥९॥ हवीं होमिलें सकळिक। पूर्णाहुतीसीं दशमुख। रामें घालोनि सकळिक। याग देख संपविला ॥१०॥ संपवोनि रणयज्ञ। हातींचें ठेविलें चाप बाण। तेंचि अवभृथ[2] झालें पूर्ण। राम विचक्षण याज्ञिक ॥११॥

नंतर श्रीराम ब्राह्मणांना दक्षिणा देतात : ऋत्विजांसी निजदक्षिणा। देतां उल्लास रघुनंदना। एका सायुज्य दिधलें जाणा। विदेहत्वदान एकांसी ॥१२॥ एका दिधलें अनंत सुख। एका दिधलें कीर्तन देख। नामें गर्जता हरिख। ब्रह्मांडलोक उद्धरती ॥१३॥ ऐसें करोनि दक्षिणादान। रामें संपविला रणयज्ञ। ऋत्विज करोनियां प्रसन्न। श्रेयः संपादन[3] विजयश्री ॥१४॥ कोणी करिती अश्वमेध। एक करिती नरमेध। रामें केला राक्षसमेध। अति विशुद्ध याज्ञिक ॥१५॥

ततो विमुक्तं सशरं शरासनम् महेंद्रदत्तं कवचं रथं च।
विमुच्यं रोपं रिपुनिग्रहे कृतम्। शशीव सौम्यत्वमुपागमत्पुनः ॥१॥

परशुरामांकडून रावणवधासाठीं मिळालेला क्रोध रामांनी शांत केला : निवटोनियां लंकापती। रणामाजी रणख्याती। करोनि हातींचें चाप रघुपती। ठेविलें क्षिती बाणेंसीं ॥१६॥ परशुरामदत्त क्रोध। करावया रावणवध। झाला होता उद्‌बुद्ध[4]। तोही निजानंद पावला ॥१७॥ अग्नि पेटविल्या पाहे। हविर्द्रव्य निःशेष खाये। सवेंचि उपरत[5] होवोनि राहे। लीन होये निजरूपीं ॥१८॥ तेंवी श्रीरामाचा क्रोध। करोनियां रावणाचा वध। कार्य साधिलें अगाध। अति आल्हाद पावला ॥१९॥ पुढें कांही कार्य स्थिती। पुसावया स्वामीप्रती। विनवूं पाहे विनीतवृत्तीं। तंव निजचित्ती आठवलें ॥२०॥ रामें पाहतां कृपादृष्टीं। ब्रह्मा स्रजी ब्रह्मांडकोटी। जयाची विक्षेपभृकुटी। सकळ सृष्टी संहारी ॥२१॥ त्या श्रीरामाचें कार्य जाण। म्यां साधिलें आपण। ऐसी श्लाघ्यता करील कोण। श्रीरघुनंदनकृतकार्या ॥२२॥ ऐसें विचारोनि चित्तीं। लागिन्नला निजवृत्ती. सांडोनि देहाहंकृती। क्रोध निजशांती पावला ॥२३॥ इंद्रें पाठविला रथा। त्यास पूर्वींच रघुनाथ।आरूढला नाहीं तेथ। रावणघात पैं करितां ॥२४॥ क्रोध नमूनि रघुपती। स्वयें पावला निजशांती। तेणें काळें श्रीराममूर्ती । शोभा अतिदीप्तीं शोभत ॥२५॥ शोभा अति देदीप्यमान। प्रभा नव्हे ते अत्यंत उष्ण। अति शीतळ नव्हे जाण। विलक्षण प्रकाश ॥२६॥ त्या प्रकाशातें देखतां। अति उल्लास वाटे चित्ता। देहाचें भान सर्वथा। आठवितां नाठवे ॥२७॥ प्रबोधचंद्र रघुपती। नित्यउदय त्रिजगतीं। उदय अस्त निश्चितीं। अस्त पावती निजतेजें ॥२८॥

तं रावणवधं दृष्ट्वा देवगंधर्वदानवाः। जग्मुः स्वैस्वैर्विमानैस्तु कपयंतः शुभाः कथाः ॥२॥
अनुरागं च वीर्यं च लक्ष्मणस्य च धीमतः। पातिव्रत्यं च सीताया हनूमंतः पराक्रमम् ॥३॥
रावणस्य वधं घोरं रामस्य च पराक्रमम्। सुयुद्धं वानराणां तु सुग्रीवस्य च मंत्रितम् ॥४॥

ऐसिया रामातें देखून। भ्याला आतुर्बळी दशानन। ज्यासी कांपे त्रिभुवन। तो क्षणें रामें निवटिला ॥२९॥

श्रीरामांचा विमानस्थ देवांकडून जयजयकार व रामकथासंकीर्तन: तेणें आनंदे सुरवर। विमानस्थ खेचर[6]। अवघे करिती जयजयकार। हर्षे निर्भर आकाशीं ॥३०॥ देव दानव गंधर्व। अप्सरादि

---

शब्दार्थ : १. होमाचे द्रव्य, २. यज्ञसमाप्तीच्या वेळी करावयाचे स्नान, ३. कल्याणप्राप्ती, ४. जागृत, ५. शांत, ६. आकाशसंचारी.

गणसमुदाव। यक्षकिन्नरादि सर्व। महदाश्चर्य मानिती ॥३१॥ सकळमंगलदायक। सकळकलिमलविध्वंसक। श्रीरामकथा अलोकिक। वर्णिती देख अति प्रीतीं॥३२॥ अतिघोरकर्मा रावण। त्रैलोक्या अजेय पूर्ण। तो वधिला न लागतां क्षण। विंधोन बाण श्रीरामें॥३३॥ तेथें वाळीची गोष्टी कायसी। कोण गणी हो कबंधासी। खर दूषण त्रिशिरा यांसी। वधितां त्यासी वेळु न लगे॥३४॥ महाबाहु कुंभकर्ण। विशाळरूप अति दारुण। खातां न पुरे त्रिभुवन। वधिला तो बाण विंधोनी॥३५॥ बंदी घातली सुरमांदी[1]। बंधूसह वधिला दुर्बद्धी। देव सोडविले बंदीं। कीर्ति अगाध श्रीरामीं॥३६॥ तैसाचि सौमित्र निजसखा। श्रीराम सेवेलागीं देखा। तुच्छ केलें शरीरसुखा। आहार तो निःशेख वर्जिला॥३७॥ चौदा वर्षे निराहारी। चौदा वर्षे ब्रह्मचारी। अति नैष्ठिकव्रतधारी[2]। प्रीति थोरी रामसेवे॥३८॥ अनिवार प्रेमाथिले[3]। निमेष रामसेवे न टळे। तेणें भजनें सामर्थ्य आलें। दुष्टा वधिलें इंद्रजिता॥३९॥ चौदा वेळां सुरपती। बांधोनि आणिला निमेषगतीं। त्याची क्षणार्धे केली शांती। श्रीरामभक्तिप्रतापें॥४०॥ तैसाचि सुग्रीव कपिपती। लक्ष्मणें स्थापिला अति प्रीतीं। तेणें जीवित्व रघुपतीं। अर्पितां चित्तीं संतोष॥४१॥ जेणें वीर रावणासारिखा। खेदक्षीण केला देखा। आतुर्बळियाचा आवाकां[4]। छेदी नाका कुंभकर्णाच्या॥४२॥

तशीच हनुमंताची स्तुती : सकळांहूनि विचित्र। हनुमंतांचें चरित्र। अमल कीर्ति अति सुंदर। जेणें पवित्र त्रिलोक॥४३॥ जेणें गांजिलें दशवक्त्रा। लंकेमाजीं केलें क्षत्रा[5]। आश्वासिली सीता सुंदरा। युक्ति कपींद्रा अनिवारा॥४४॥ न लागतां निमेषमात्र। एकलेनि वीरें सत्वर। शिळीं बुजोनियां सागर। सैन्य परपार पावविलें॥४५॥ आणोनियां द्रोणाद्री। वांचविला सौमित्री। अहिरावणाची करोनि बोहरी। स्वामी झडकरी सोडविला॥४६॥ अगाध हनुमंताची कीर्ती। जेणें पावन त्रिजगती। तैसेचि सकळ जुत्पती। अगाध कीर्ती श्रीरामीं॥४७॥ युद्ध करितां समरांगणीं। शिरें दुधड होती रणीं। पुच्छें बांधितां वेंटाळूनी। सवेंचि रणीं मिसळती॥४८॥ सीता माउली पतिव्रता। अवतार धरी सुरकार्यार्था। प्रबळ छळितां लंकानाथा। नाहीं चित्ता विक्षेप[6]॥४९॥ श्रीरामवियोगें व्रतस्थ। फळ मूळ जळ समस्त। सर्वथा नातळे चित्त। सावचित्त रामभजनीं॥५०॥ श्रवणीं नित्य रामकथा। एकरूप होतां श्रोता वक्ता। सबाह्य स्वानंदसुखावस्था। श्रवण करितां रामाचें॥५१॥ वाचेंसीं नित्य रामगुण। वर्णितांचि आनंद पूर्ण। राक्षसींसी समाधान। देहाचें भान विसरल्या॥५२॥ जानकीपासीं राखण असतां। विसरल्या निजक्रूरता। श्रीरामप्रेमें सदा डुल्लतां। समाधिअवस्था राक्षसींसी॥५३॥ जानकीचे निजसंगती। तृणादि सकळ वनस्पती। आदिकरोनि पाषाणजाती। राम जपती अनिमेष[7]॥५४॥ जानकीचेनि धर्मे तेथें। आन न दिसे सर्वार्थे। राम भासे जेथें तेथें। निजरूपें पाहतांचि॥५५॥ ऐसी एकांएकांची ख्याती। नामें पावन त्रिजगती। एवढी रामभक्ताची कीर्ती। तो रघुपती केंवी वर्णवे॥५६॥ ऐसी श्रीरामाची गुणकीर्ती। आणि रामसेवकांची ख्याती। स्वर्गी वर्णीत सुरपती। निजधामाप्रती स्वयें गेले॥५७॥

इंद्रसारथी मातलीकडून रामांस नमन व तो स्वर्गास जाण्याची आज्ञा विचारतो : इंद्रसारथी विचक्षण। सुवर्णबंदी देदीप्यमान। रथाखालीं उतरोन। श्रीरघुनंदन नमियेला॥५८॥ प्रांजळि[8] होऊन विनवित। नमोनियां रघुनाथ। होवोनियां अति विनीत। आज्ञा पुसत स्वर्गगमना॥५९॥ परिसोनियां रघुनंदन। अत्यादरें संतोषोन। गंभीर गिरा प्रसन्नवदन। मधुर वचन अनुवादे॥६०॥ काय कृपेसीं आले कोंभ[9]। कीं अमृता निघाली जीभ। लावण्याचें निजवालभ[10]। तैसी शोभा शब्दांची॥६१॥

शब्दार्थ : १.देवसमूह, २. निष्ठायुक्त व्रताचरणी, ३. प्रेमभावानें, संपन्न, ४. शक्ति, ५. युद्धाला, ६. एकसारखे, ७.सतत ८. हस्त जोडून, ९. अंकुर, १०. आवडतेपण.

राघवेणाभ्यनुज्ञाते मातलिः शक्रसारथिः। दिव्यं तु रथमास्थाय दिवमेवाभ्यपात ह॥५॥

रामांकडून मातलीची पूजा व इंद्राला निरोप : अत्यादरें रघुपती। पूजोनियां शक्रसारथी[1]। इंद्राप्रति विनंती। अति प्रीतीं सांगत॥६२॥ तूं लोकपाळांचा राजा। तुझेनि सुखी विश्व प्रजा। निवटावया राक्षसराजा। संभाळा माझा तुंवा केला॥६३॥ तुवां पाठविला रथ। शस्त्रास्त्रांसीं समवेत। तेणें बळें लंकानाथ। निमेषार्धांत निवटिला॥६४॥ तुम्हीं अनुग्रह कराल ज्यासीं। तो रंकही राज्यपदासीं। सुखें चढे अनायासीं। सकळ भोगांसी भोगित॥६५॥ अनुग्रहाचें बळ दारुण। तेणें निवटिला दशानन। काय तुमचें व्हावें उत्तीर्ण। म्हणोनि लोटांगण मौनेंचि॥६६॥ ऐसें सांगतां मातलीसीं। येरू विस्मित मानसीं। राम स्तवितो इंद्रासी। जो या विश्वासीं जीवन॥६७॥ ज्याची विक्षेपभ्रूकुटी[2]। तळा आणी सकळ सृष्टी। तो इंद्राचा उपकार पोटीं। कृपेसाठीं वाहतसे॥६८॥ अत्यादरें मातलीसी। वस्त्रें भूषणें देवोनि त्यासी। बोळवितां अति प्रीतींसीं। येरें साष्टांगेंसीं नमियेला॥६९॥

परिष्वज्य च सुग्रीवं लक्ष्मणेनाभिनंदितः। पूज्यमानो हरिगणैराजगाम सुरालयम्॥६॥

मातली श्रीरामांचा व सर्व लहानथोर वानरगणांचा निरोप घेतो : करोनियां प्रदक्षिणा। मातलि लागला रामचरणा। तैसेंचि नमिलें लक्ष्मणा। सुग्रीवही जाणा नमियेला॥७०॥ रावणाचे मुखें जाण। सर्वगत रघुनंदन। जाणोनियां संपूर्ण। नमी वानरगण रामरूपें॥७१॥ हनुमान आदि समग्र। जुत्पती जे कां लहानथोर। नमूनियां वेगवत्तर। जयजयकार पैं केला॥७२॥ नमन करोनि सकळांसी। आरूढोनियां रथासीं। हर्षे गर्जत नामेंसीं। स्वधामासी तो गेला॥७३॥ इंद्र होवोनि शरणागत। श्रीरामा पाठविला रथ। तें देखोनि अत्यद्‌भुत। आश्चर्य मानित सकळिक॥७४॥ निवटिलिया रावण। खवळोनि वानरगण। विध्वंसावें लंकाभुवन। तंव रामशासन[3] दुर्धर[4]॥७५॥ शिष्टाईचे वेळी अंगदें येथें। मंडपातें आणिलें होतें। तो परतोनि मागुतें। श्रीरामें तेथें पाठविला॥७६॥ येणेंचि भयें वानरगण। न पाहती लंकाभुवन। तंव देखोनियां बिभीषण। रघुनंदन बोलत॥७७॥ ते श्रीरामाज्ञा असतां। वानरातें अनवाळी[5] करितां। क्रोधें झालिया दंडिता। मग राखिता पैं कैंचा॥७८॥

श्रीराम लक्ष्मणाला बिभीषणास अभिषेक करण्याची आज्ञा देतात: ऐकें बापा लक्ष्मणा। दुष्टा निर्दाळिले रावणा। आतां निजभक्ता बिभीषणा। लंकाभुवना अभिषेकीं॥७९॥ जेणें त्रासिले महर्षी। बंदी घातलें सुरवरांसी। त्या वधिलें रावणासी। आतां बिभीषणासी अभिषेकीं॥८०॥ जेणें हरिलें जानकीसी। आणि मारिलें जटायूसी। त्या वधिलें लंकेशासी। बिभीषणासी अभिषेकीं॥८१॥ हित सांगतां प्रीतीसीं। लाता हाणितल्या बंधुसी। त्या निवटिलें रावणासी। बिभीषणासी अभिषकीं॥८२॥

सौमित्रिं सत्वसंपन्नं रामो लक्ष्मणमब्रवीत्। बिभषिणममुं सौम्य लंकायामभिषेचय॥७॥
अनुरक्तं च भक्तं च तथा पूर्वोपकारिणम्। एष मे परमः कामो यदहं रावणानुजम्॥८॥
लंकायां सौम्य पश्येयमभिषिक्तं बिभीषणम्॥९॥

बिभीषणाला राज्याभिषेक करणे हे आपले व्रताचरण असे राम सांगतात : सौमित्रा बंधु लक्ष्मणा। सत्त्वसंपन्न बिभीषणा। करावोनियां मंगलस्नाना। सिंहासना अभिषेकीं॥८३॥ आमचे मित्रत्वालागीं जाण। स्वकुळ निर्दाळिलें आपण। महामोहाचें आयतन[6]। तो अहंरावण मारविला॥८४॥ आमचे भक्तीलागीं वहिलें[7]। जेणें सर्वस्व अर्पिलें आपुलें। तया बिभीषणा पहिलें। अभिषेकिलें पाहिजे॥८५॥ हेंचि आम्हां निजव्रत। हेचि परम आचरित। हेंचि अनुष्ठान

शब्दार्थ : १. इंद्रसारथी मातली, २. वक्र भिवई, ३. रामाज्ञा, ४. कडक, ५. अपराध, ६. स्थान, ७. लागलीच.

समस्त। जें शरणागत स्थापावा ॥८६॥ हाचि आम्हां पुरुषार्थ। हाचि आम्हां इत्यर्थ। हाचि आम्हां सिद्ध्यर्थ। जें शरणागत स्थापावा ॥८७॥ हाचि आम्हां परमार्थ। हाचि आम्हां भावार्थ। येणेंचि आमचा सत्यार्थ। जें शरणागत स्थापावा ॥८८॥ हा काळवरी नवस। नवसिले होते बहुवस। ते उजवावे सावकाश। बिभीषणा स्थापूनी ॥८९॥ माझ्या डोळियांची धणी[1]। सौमित्रा पुरवीं झडकरोनी। बिभीषणा अभिषेचूनी। आरूढ सिंहासनीं मज दावीं ॥९०॥ सिंहासनीं शरणागता। आरूढला न देखतां। मज होतसे परमावस्था[2]। बोलीं सर्वथा न बोलवे ॥९१॥ ऐसें बोलतां रघुनाथ। अभिषेकालागीं त्वरित। सौमित्र सिद्ध झाला तेथ। हर्षयुक्त स्वानंदें ॥९२॥

श्रीराम स्वतः अभिषेकाला येणार नाहीत म्हणून बिभीषणाला दुःख : तें देखोनि बिभीषण। झाला अत्यंत उद्विग्न। श्रीराम न येवोनि आपण। सांगे अभिषिंचन सौमित्रा ॥९३॥ या शब्दाचा कवण हेत। म्हणोनि झाला चिंताक्रांत। अभिषेका न ये श्रीरघुनाथ। म्हणोनि स्फुंदत अति दुःखी ॥९४॥ कोणासी पुसूं हा विचार। कोण जाणेल अंतर। क्षोभावया रघुवीर। काय विचार पैं झाला ॥९५॥ सांडूनियां रघुनंदन। सर्वथा राज्य न करीं जाण। न पाहें मी लंकाभुवन। सुख कोण अभिषेका ॥९६॥ म्हणोनियां म्लानवदन। अत्यंत झाला बिभीषण। ते देखोनियां वायुनंदन। पुसे आपण अति प्रीतीं ॥९७॥

दुःखित बिभीषणाला मारुतीने त्याची चिंता विचारल्यावरून बिभीषण कारण सांगतो: बिभीषणा सर्वज्ञा। समय आला अभिषिंचना। आणि दिसतोसी म्लानवदना। हीं विवंचना[3] लक्षेना ॥९८॥ ऐकोनियां त्याचें वचन। येरें घातलें लोटांगण। सद्गुरुवीण अंतरज्ञान। जाणता आन[4] असेना ॥९९॥ ऐकें स्वामी वायुनंदना। रामें आज्ञापिलें लक्ष्मणा। जे अभिषेकावें बिभीषणा। तेणें मना अति चिंता ॥१००॥ जरी प्रीति होती चित्तीं। तरी येवोनि रघुपती। अभिषेकीचना स्वहस्तीं। तेणें चित्तीं अति चिंता ॥१॥ ऐसें ऐकोनि हनुमंता। अति विस्मय झाला चित्ता। पुसावया रघुनाथा। होय विचारिता मारुती ॥२॥ अभिषेकालागीं जाण। त्वरा करितां लक्ष्मण। म्लान देखोनि बिभीषण। श्रीरघुनंदन पूसत ॥३॥ सौमित्रा विलंब कायसा येथ। वेगीं अभिषेकीं शरणागत। ऐकोनियां हनुमंत। काय बोलत तें ऐका ॥४॥

बिभीषणाचें मनोगत मारुतीने अत्यंत परखड शब्दांत रामांना सांगून स्वतः राज्याभिषेक करण्यास सांगितले: जो वोळगणा[5] सर्वांगाचा[5]। जो लाडका श्रीरामाचा। राम आज्ञाधारक ज्याचा। ऐकें त्याचा वचनार्थ ॥५॥ भजनाचेनि पडिभरें। सायुज्य जेथें न सरे। तो हनुमान अति निष्ठुरें। बोलत उत्तरें रामासीं ॥६॥ राज्याभिलाष तुझे पोटीं। आणि सौमित्रासी उठाउठीं। अभिषेकाची सांगसी गोष्टी। ते न मने सृष्टी श्रीरामा ॥७॥ अंतरीं लोभाचें ठाणें। बाह्य विरक्ती मिरवणें। लौकिकासी जोगावणे। समर्थ करणें कळेना ॥८॥ राज्यभिलाष बिभीषणा। सर्वथा नाहीं रघुनंदना। तूं आरूढोनि सिंहासना। लंकाभुवना अंगीकारीं ॥९॥ अनुसरोनि रामासी। जो राज्यातें अभिलाषी। तेणें बुडविलें धर्मासी। अधःपातासी स्वयें गेला ॥११०॥ यालागीं गा रघुनाथा। लंका अंगीकारोनि आतां। चरणीं स्थापीं शरणागता। विचार अन्यथा न करावा ॥११॥ म्हणोनि घातलें लोटांगण। अंगीकारीं सिंहासन। अंगीकारीं राजभुवन। विचार आन न करावा ॥१२॥

तू का रागावलास? श्रीरामाचा प्रश्नः ऐसें विनवितां हनुमंता। आश्चर्य झालें रघुनाथा। सविस्तर

शब्दार्थ : १. आवड, तृप्ती, २. अत्यंत खेद, ३. काळजी, ४. दुसरा, ५. पूर्णभक्त.

वृत्तांत न कळतां। कोण्या अर्था कोपसी ॥१३॥ केंवी माझा लोभ कळला। कोण्या[1] अर्था[1] कोप आला। बिभीषण अव्हेरिला। या बोला मज न साहवे ॥१४॥ प्राण जाईल जावो सुखें। परी बिभीषण असावा सुखें। म्हणोनि नवसियेलें अनेकें। मी निजहरिखें नवसित ॥१५॥ बिभीषणा सिंहासनीं। कैं[2] देखेन राजधानीं। ऐसें नवसीं अनुदिनीं। प्रतिक्षणीं चिंतित ॥१६॥ ते हनुमंता आजि समस्त। माझे पुरले मनोरथ। अभिषेकितां शरणागत। हर्षित चित्त पैं माझें ॥१७॥

वाचादत्तं मनोदत्तं धारादत्तं न दीयते। अरण्ये निर्जले देशे दाता भवति सूकरः ॥१०॥

वाग्दानाचें लक्षण, असत्यवाणीचे दुष्परिणामः श्रीराम मारुतीला सांगतात : एक करिती धारादन। एक करिती मनोदान। एक करिती वाग्दान। ऐक लक्षण तयाचें ॥१८॥ मनें कर्मे आणि वचनें। दिधलें दान नेदीं म्हणे। सूकर होवोनि वसवी वनें। फळजळाविणे पैं देखा ॥१९॥ आपण तरी प्रत्यक्षते। प्राप्त न होतां लंकेतें। अभिषेकिले बिभीषणातें। त्या वचनास केंवी सांडो ॥१२०॥ ज्याची प्रतिज्ञा लटकी होये। धरा त्याचा भार न साहे। विजयश्री केंवी लाहे। निंद्य होय जगामाजी ॥२१॥ अनृतवादी जे जन। अपत्याचें जीवन। विजयश्री आपण। जाणें सांडून तेणें पापें ॥२२॥ अनृतवादियाचे[3] देहीं। तेज सर्वथा नाहीं। कळाहीन सदा पाहीं। जग तेंही निंदित ॥२३॥ अनृतवादियाचा प्राण। भाररूप वाहे पवन। जीवें जीतां प्रेतचिन्ह। भासे संपूर्ण जगासी ॥२४॥ त्याचें जे कां हृदयाकाश। तमें वसविलें सावकाश। परमार्थाचें घर ओस। झालें निःशेष सर्वथा ॥२५॥ सत्यप्रतिज्ञेचे जे नर। ते जैं सांडिती उत्तर। तैं स्वर्गस्थ त्यांचे पितर। ते सत्वर पैं खचती ॥२६॥ पापाचें तें अधिष्ठान। नरकाचें तें निजभवन। तेथूनि त्यांसी नाहीं निर्गमन[4]। स्वयेंचि जाण निजनरक ॥२७॥

स्वतः लंकेत न जाण्याचे कारण श्रीराम सांगतात : यालागीं वायुनंदन। सूर्यवंशी राजे जाण। एकनिष्ठ सत्यप्रतिज्ञ। धर्मभूषण वंशासीं ॥२८॥ ते वंशींचा दाशरथी। माझें नाम रघुपती। तो जैं सांडीं वचनोक्ती। तैं अपकीर्ती जोडिली ॥२९॥ तुम्हांसी संदेह निजचित्तीं। तोही कळला निश्चितीं। अभिषेका न येचि रघुपती। ऊर्मिलापती[5] पाठवितो ॥१३०॥ हाचि सकळांचा भावो। त्याचा ऐका अभिप्रावो। लंका दान दिधलें पहा वो। सर्वथा जावों नये तयांत ॥३१॥ दाता निघे जैं दानांत। त्याचें श्रेय[6] गेलें वाताहत। नव्हे स्वार्थ ना परमार्थ। वृथा जीवित लौकिकीं ॥३२॥ यालागीं श्रीरघुनंदन। लंकेमाजी न ये जाण। बिभीषणाचें अभिषिंचन। केलें दर्शन होतांचि ॥३३॥

तरी अनमान न करिता सर्वांनी मिळून बिभीषणाला अभिषेक करावा : आतां यावें अभिषिंचना। तैं बाध आला प्रथमवचना। आन सर्वथा न करा जाणा। लंकाभुवना न पाहें ॥३४॥ जीवाचा जीव तूं कपिनायाका। सीताशुद्धि आणिल्या देखा। वाळूची करोनि दाविली लंका। वोल[7] देखा गुंतली ते ॥३५॥ ज्यासीं वोल गुंतली राहे। वृथा त्याचें जिणें काये। यश कोठेंचि न लाहे। निंद्य होये लौकिकीं ॥३६॥ नजिभक्ताचें क्रीडाभुवन। सर्वथा गुंतो नेदीं जाण। वोल सोडवावयालागून। स्वयें लक्ष्मण आज्ञापिला ॥३७॥ तंव विपरीत झालें तेथ। न कळतांहि हा इत्यर्थ। क्षोभलासी तूं हनुमंत। शरणागतही क्षोभला ॥३८॥

सर्वांच्या गैरसमजामुळे त्यांची राम क्षमा मागतात : सकळां माझें लोटांगण। क्षमा करावी आपण। सकळिकीं लंके जाऊन। बिभीषण अभिषेकावा ॥३९॥ एकोनियां तें वचन। तटस्थ झाले सकळ जन। अगाध श्रीरामाचें ज्ञान। अनवच्छिन्न निर्लोभ ॥१४०॥

शब्दार्थ : १. काय म्हणून, २. केव्हा एकदा, ३. खोटे बोलणाराचे, ४. सुटका, गती, ५. लक्ष्मणाला, ६. पुण्य, ७. तारण.

तथेत्युक्त्वा सुसंहृष्टः सौवर्णं घटमाददे । कुंभेन तेन सौमित्रिरभ्यषिंचद्विभीषणम् ॥११॥

रामाज्ञेने अभिषेकाची पूर्तता : ऐकोनि श्रीरामाचें वचन। अति आल्हादें लक्ष्मण । मस्तकांजलि करोनि नमन। अभिषिंचन आरंभी ॥४१॥ आज्ञापितां हनुमंता। अति उल्लास झाला चित्ता। सामग्री अति आदरता । होय करिता स्वानंदें ॥४२॥ नगर शृंगारिलें कोडें। गुढिया मखरें कुंकुमसडे। मुक्ताफळांचे सुहाडे[१]। चौक निवाडें शोभती ॥४३॥ सप्त मृत्तिका सत्वर। सप्त सागरींचें नीर। अष्ट पल्लव परिकर[२]। अत्यादरें आणिले ॥४४॥ प्रेमाथिला[३] सुवर्णकुंभ। उदकें भरूनी स्वयंभव। तेचि सहस्रधारा प्रेमवालभ[४]। अति सुलभ अभिषेक ॥४५॥ सद्विवेक परिकर। तेंचि भद्रपीठ औंदुबर। साधूनियां विरक्तिव्याघ्र। चर्म सनखाग्र अनाहत[५] पैं ॥४६॥ गादी बोधाची सुलक्षण। चैल[६] विरज[७] शोभायमान। आरूढावया बिभीषण। सिंहासनसामग्री ॥४७॥ सौमित्र येवोनि आपण। श्रीरामकृपेचें सिंचन जाण। अभिषेकोनि बिभीषण। सिंहासनीं पूर्ण बैसविला ॥४८॥ चिद्रत्नांचे अलंकार। ते लेवविले परिकर। चिदंबरें मनोहर। वस्त्रें परिकर शोभती ॥४९॥ अनन्यप्रीतीचीं सुमनें। गुंफोनियां अनुसंधानें। शृंगारिलें सुमित्रानंदनें। शरणागता शरण्य कृपाळू ॥१५०॥ सोहंभावाचें नीराजन। कुरवंडी बिभीषण। अति प्रीतीं सुमित्रानंदन। ओंवाळून सांडित ॥५१॥ तेणें काळें बिभीषण। भद्रीं[८] अति विराजमान। देखोनियां वायुनंदन। करी निंबलोण सर्वस्वें ॥५२॥ दीपावळी नीराजनें। ओंवाळिती जीवप्राणें। हरिखलीं वानरगणें। देती किराण रामनामें ॥५३॥ अनन्यगतीचे वाग्जल्प। वर्णितां श्रीरामप्रताप। नामें गर्जती अमूप। सत्यसंकल्प श्रीराम ॥५४॥ देहत्रिकूटनिवासी। वधूनि अहंरावणासी। मुक्त करानि लंकेसी। शरणागतासी स्थापिलें ॥५५॥ राक्षसमंडळीमाझारीं। बिभीषण सहपरिवारीं। शोभता झाला निजगजरीं। कृपेंकरीं रामाचे ॥५६॥

कृपामूर्ती श्रीरामांमुळे शरणागत सिंहासनस्थ झाला : राम कृपेचें जीवन। राम कृपेचें अधिष्ठान। रामकृपा सनातन। बिभीषण शोभत ॥५७॥ श्रीराम कृपेचा पुतळा। श्रीराम कृपेचा कोंवळा। श्रीराम कृपेचा वहिला। निजराज्य पावला बिभीषण ॥५८॥ अति प्रीतीं शरण आला। अति प्रीतीं आश्वासिला। स्वराज्य देखोनि वहिला[९]। स्वपदीं स्थापिला निजभक्त ॥५९॥ नगरनागरिकां समस्तां। अति प्रीतीं राक्षसवनितां। पूर्णकुंभ जळभरिता। दधि मधु अक्षता सुमन दुर्वा ॥१६०॥ लाजा[१०] घेवोनि अति प्रीतीं। राक्षसवनिता तेथें येती। श्रीरामाची अमल कीर्तीं। ओंवाळिती बिभीषण ॥६१॥ एका जनार्दना शरण। शरणागत बिभीषण। स्वराज्यीं स्थापूनियां पूर्ण। कीर्ती पावन तिहीं लोकीं ॥६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां बिभीषणराज्याभिषेचनं नाम षट्षष्टितमोऽध्यायः ॥६६॥ ओंव्या ॥१६२॥ श्लोक ॥११॥ एवं ॥१७३॥

# अध्याय सदुसष्टावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## जानकीचे आगमन

श्रीरामांचा सर्वत्र जयजयकार : बिभीषण राज्यधर। देखोनि वानर निशाचर। अवघीं केला जयजयकार। नामें अपार गर्जती ॥१॥ नामें कोंदलें पाताळ। नामें व्यापिलें जगतीतळ। नामें कोंदलें नभोमंडळ। ब्रह्मांडगोळ व्यापिला ॥२॥ नामें गर्जती माकडें। वर्णिती रामाचे

---

**शब्दार्थ :** १. सुंदर, २. प्रशस्त, ३. प्रेमसंपन्न, ४. प्रेमातिशय, ५. अखंड, ६. वस्त्र, ७. निर्मळ, ८. सिंहासनावर, ९. तत्काळ, १०. लाह्या.

पवाडे[1]। नाचती प्रेमें वाडेंकोडें। बिभीषणापुढें अति प्रीतीं॥३॥ श्रीराम दत्त तेजाकार। रावणमुकुट परिकर। आणोनि बाणें सुग्रीव वीर। धरिलें छत्र रामदत्त॥४॥ तेणें शोभा अत्यद्भुत। बिभीषण राज्यमंडित। ते देखोनि सुर समस्त। सुमनें वर्षत अति प्रीतीं॥५॥ करोनियां जयजयकार। नामें गर्जती सुरवर। नभीं सिद्धांचा जयजयकार। रामचरित्र अनुपम॥६॥

राजा बिभीषण सर्वांसह श्रीरामवंदनासाठीं निघाला : हनुमंतादि सुग्रीव वीर। सकळ वानरांचा भार। बिभीषण राज्यधर। निशाचर समवेत॥७॥ श्रीरामनमनालागीं जाणा। परम आल्हाद बिभीषणा। वानरराक्षसांची सेना। समीप घेउनि वंदना चालिला॥८॥ ध्वजपताकामंडित। मत्तगज अश्वरथ। वीर चालिले असंख्यात। अति हरिखत रामनमना॥९॥ गजस्कंधी बिभीषण। पाठीसीं सखा सौमित्र जाण। हनुमान अति विचक्षण। दोहीं नाहीं सैन्य सज्जिलें॥१०॥ यथाक्रमें परिकर। दोहीं भागीं विचित्र। दक्षिणांगीं सुग्रीव वीर। अति मनोहर वेत्रपाणि[2]॥११॥ वामांगी चालत हनुमंत। जो श्रीरामाचा आप्त। श्रीरामआज्ञा तेथ। पुढें चालत जुत्पती॥१२॥ वाद्यें विचित्र अति गजरीं। भोंगळा[3] काहळा[3] निशाण भेरी। विराणीं वाजती अति कुसरीं। ध्वनीं विचित्र त्यांमाजी॥१३॥ वाद्यांचा नाद गंभीर। भाट[4] गर्जती अपार। अवघे करिती जयजयकार। आले रघुवीरवंदना॥१४॥ राज्याभिषिक्त बिभीषण। देखोनियां रघुनंदन। आनंद उथळला[5] पूर्ण। तेणें त्रिभुवन कोंदलें॥१५॥

लक्ष्मणाने बिभीषणाला श्रीरामांच्या चरणांवर घातले : हातीं धरोनि बिभीषण। पुढें झाला सुमित्रानंदन। श्रीरामचरणा वंदन। करवी आपण अत्यादरें॥१६॥

स तान्गृहीत्वा दुर्धर्षो राघवाय न्यवेदयत्। मांगल्यं मंगलं सर्वं लक्ष्मणाय च वीर्यवान्॥१॥
कृतकार्यं समृद्धार्थं दृष्ट्वा रामो बिभीषणम्। यावच्चंद्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी॥२॥
यावद्रामकथा लोके तावद्राज्यं बिभीषणे। प्रतिजग्राह तत्सर्वं तस्यैव प्रियकाम्यया॥३॥
उवाचेदं वचो रामो हनूमंतं प्लवंगमम्। अनुज्ञाप्य महाराजमिमं सौम्य बिभीषणम्॥४॥
प्रविश्य नगरीं लंकां कुशलं ब्रूहि मैथिलीम्॥५॥

आनंदित होऊन श्रीरामांनी बिभीषणाला आशीर्वाद दिला : जैसें श्रीरामाचें मनोगत। तैसें सुमंगल वेदोक्त। देखोनियां रघुनाथ। आनंदभरित पैं देखा॥१७॥ अति दुर्धर रावण। क्षणें निवटोनियां जाण। अभिषेकिला बिभीषण। श्रीरघुनंदन सुखमय॥१८॥ राज्यालंकृत बिभीषण। देखोनियां रघुनंदन। अति आल्हाद पावोन। आशीर्वचन पैं देत॥१९॥ विपायें ऐसें घडों शके। जैं भानूतें तम जिंके। तरी बिभीषणा निकें[6]। अक्षयी सुखें राज्य भोगीं॥२०॥ चंद्र संतप्त होय आगीं। अथवा प्रळय जावो भंगीं। तथापि बिभीषणा जगीं। अभंग भोगीं निजराज्य॥२१॥ बैसका[7] सांडी कुळाचळा। पृथ्वी जाय रसातळा। तरी जो श्रीरामें स्थापिला। तो अक्षयी झाला बिभीषण॥२२॥ जंववरी श्रीरामकीर्ती। शाश्वत आहे त्रिजगतीं। तंववरी सुखसंवित्ती। अक्षयस्थितीं राज्य करीं॥२३॥ जंववरी श्रीरामनामकीर्ती। जंववरी श्रीरामभक्ती। जंववरी श्रीरामाची ख्याती। तंव राज्यस्थिती बिभीषणा॥२४॥

बिभीषणाला लंकेत नेऊन ही वार्ता जानकीला सांगण्यास रामांनी मारुतीला सांगितले : ऐसे देवोनि आशीर्वचना। सर्वेचि सांगे वायुनंदना। हनुमंता सर्वज्ञा। लंकाभुवना नेईं यासी॥२५॥ सप्राकार सतोरण। अति मंडित लंकाभुवन। महोत्सवें वायुनंदन। राजा बिभीषण प्रवेशवीं॥२६॥ निर्दळूनि रावणासी। अभिषेकिलें बिभीषणासीं। गुढी उभवोनि जानकीसी। हे वार्ता तिसी सांगावी॥२७॥ ऐकोनियां श्रीरामाज्ञा। उल्लास वायुनंदना। मस्तकीं वंदोनियां वचना। घाव निशाणा घातला॥२८॥

---

शब्दार्थ : १. पराक्रम, २. हातांत काठी घेऊन, ३. वाद्यविशेष, ४. स्तुतिपाठक, ५. उपजला, ६. खरोखर, ७. बैठक.

सर्वांनी वाजतगाजत बिभीषणाला लंकेत नेला : नळनीळादि जुत्पती। सुग्रीव राजा वानरपती। अंगदेंसहित मारुती। अति प्रीतीं निघाला॥२९॥ वाद्यें लागलीं विचित्रें। ध्वनि उठला अति गजरें। हरिखें नाचती वानरें। माथां पुच्छाग्रें उभवोनी॥३०॥ उपायनें बळिदानें। राक्षस आणिती सन्मानें। प्रीतीं घालिती लोटांगणें। बिभीषण संतुष्टे॥३१॥ सुरासुरीं यथेष्ट। वानर हावोनियां भाट[1]। श्रीरामगुण उद्भट। कीर्ति अचाट वर्णिती॥३२॥ अति गजरें राज्यमंडित। चौघे प्रधान समवेत। वानरमांदी अपरिमित। लंकेआंत प्रवेशले॥३३॥

लंकेत गेल्यावर मारुतीसह बिभीषण सीतेला नमन करण्यास जातो: प्रवेशोन लंकाभुवन। बिभीषण अति विचक्षण। रामांगनेलागीं नमन। करावया आपण चालिला॥३४॥ प्रवेशोनि अशोकवनीं। देखोनियां जनकनंदिनी। नमन करावयालागूनी। सकळां मनीं उत्साहो॥३५॥ पुढें देखोनि जानकीसी। सुख दाटलें हनुमंतासी। लोटांगण अति प्रीतीसीं। घालोनि चरणांसीं लागला॥३६॥

मारुतीला पाहून जानकीला परमानंद, परस्परांचे दृढलिंगन: देखोनियां हनुमंतासी। अति आल्हाद जानकीसी। उचलोनि अति प्रीतीसीं। सर्वभावें आलिंगिला॥३७॥ महार्णवांतून बाळक। सुटोनियां एकाएक। मातेंसीं भेटतां आवश्यक। सप्रेम देख आलिंगी॥३८॥ तेंवी पुत्रस्नेहें हनुमंता। आलिंगितां जनकदुहिता[2]। आनंद दाटला चित्ता। सप्रेमता सद्गदित॥३९॥ श्रीरामभक्ति सुखापुढें। पुत्रस्नेह तें बापुडें। जानकिया प्रेमपाडें। निजनिवाडें आलिंगिला॥४०॥ प्रेमाश्रूकरोनि जाण। हनुमंतासी अभिषिंचन। जानकियें करोनि पूर्ण। अमृतहस्तेंकरोनी कुरवाळी॥४१॥

जानकीला हनुमंताचे प्रांजळ निवेदन : वंदोनियां चरण। दोन्ही करसंपुट जोडून। विनविता झाला आपण। प्रीती करून हनुमंत॥४२॥ निर्दाळावया रावण। श्रीरामा आला शरण। श्रीरामभजनार्थ जाण। केलें निर्दळण स्वकुळाचें॥४३॥ अति गूढ मारका युक्ती। सांगोनियां श्रीरामाप्रती। मारविला लंकापती। विजयी रघुपती जेणें केला॥४४॥ तो हा राजा बिभीषण। श्रीरामें अभिषेकून आपण। तुज करावया नमन। प्रीती करोन पाठविला॥४५॥ या बिभीषणाचे संगतीं। विजयी तुझा श्रीरघुपती। अक्षयी विजयस्थिती। ऊर्मिलापती[3] जाण माते॥४६॥ विजयी सुग्रीव कपिराजा। विजयी अंगद युवराजा। विजयी सेनापति वोजा। विजयी रघुराजा याचेनि॥४७॥ नळनीळादि जांबवंत। वानरवीर विख्यात। रणयोद्धे रणोन्मत्त। विजयी समस्त याचेनी॥४८॥ ऐसें बोलोनि हनुमंत जाण। हातीं धरोनि बिभीषण। नमस्कारिले श्रीचरण। प्रीतीं करोन जानकीचे॥४९॥

जानकीकडून बिभीषणाला प्रेमाश्रूंचे सिंचन, नंतर सर्व वानरवीरांचे जानकीला नमन : येरी उचलोनि त्वरित। प्रीतीं मस्तक अवघ्राणित। प्रेमाश्रुसिंचने तेथ। अभिषेकित बिभीषण॥५०॥ तैसाचि सुग्रीवराजा जाण। हनुमान भेटवी आपण। येरी प्रीती उठवोन। केलें अवघ्राण मस्तकीं॥५१॥ तंव अंगद पुढें झाला। तोही प्रीतीनें आश्वासिला। नीळें नमस्कार केला। कुरवाळिला अमृतहस्तीं॥५२॥ तंव पुढें झाला जांबवंत। सुषेण दधिमुख तेथ। जानकीतें नमस्कारित। अति विनीत रामप्रेमें॥५३॥ येरी निजकृपा अवलोकन। सकळां देवोन समाधान। हनुमंतासी आज्ञापन। केलें आपण जानकियें॥५४॥

प्रथम बिभीषणाला लंकाभुवनात नेण्याची हनुमंताला सीतेची आज्ञा : श्रीरामें अभिषेकिला। निजराज्य हा पावला। अनुग्रहें विराजला। निजभुवना वहिला प्रवेशवी॥५५॥ लाहोनियां[4] आज्ञापन। हनुमान अत्यंत सज्ञान। बिभीषण आपण। राज्यभुवन प्रवेशविलें॥५६॥ सिंहासनादि सकळ भोग। श्रीरामकृपा अव्यंग[5]। बिभीषण पावला सांग। सुख अभंग उथळलें॥५७॥ सर्वथा जें दुष्प्राप्य[6] राज्य। तें श्रीरामकृपा निज। बिभीषण पावोनि सहज।

शब्दार्थ : १. स्तुतिपाठक, २. जानकी, ३. लक्ष्मण, ४. मिळवून, ५. पूर्ण, ६. दुर्मिळ.

नाचत भोज[१] आनंदें ॥५८॥ दुकाळिया जेवी मिष्टान्न। अवर्षणीं वर्षे घन। सुकतया अंकुरा जाण। होय संपूर्ण अमृतवृष्टी ॥५९॥ गतायुषा जोडे आयुष्य। रंका इंद्रपद सावकाश। तैसें जालें बिभीषणास। श्रीरामास विनटतां ॥६०॥

वानरप्रमुखांनी सीतेला नेण्याविषयी मारुतीला सांगितला : परंतु रामाज्ञा नसल्यामुळे त्याचा नकार: येरीकडे मारुती। विनविते जाले कपिपती। झाली सकळ कार्याची स्थिती। सीता सती नेवों आतां ॥६१॥ ऐकोनि तयांचें वचन। हनुमान नेदी प्रतिवचन। तेणें खवळले कपिगण। कोल्हाळ संपूर्ण आदरिला ॥६२॥ सकळ भोग आदिकरोनी। राजोपचारा देवोनि पाणी। पादत्राणही सांडूनी। एकली वनीं प्रवेशली ॥६३॥ श्रीरामसेवलागीं देखा। सांडणें केलें शरीरसुखा। ते जानकी सत्वर देखा। रघुकुळटिळका भेटवावी ॥६४॥ आम्हीं विनवितां सकळ जन। तूं न देसी प्रतिवचन। काय तुझें आहे मनोज्ञ[२]। तें संपूर्ण चिन्ह लक्षेना ॥६५॥ तंव भावार्थाचा मेरू। जो आज्ञेचा किंकरू। श्रीरामहृत्कमलमधुकरू। हनुमान वीरू विनवित ॥६६॥ स्वमुखें श्रीरघुनाथ। बोलिला नाहीं इत्थंभूत। अथवा नाहीं संकेत। ते जानकी तेथें आणावी ॥६७॥ याकरितां माझे चित्त। जालें अतिशये भ्रमित। कांही योजेना निश्चितार्थ। राहिलों निवांत म्हणवोनी ॥६८॥ नकळतां या अर्थासी। म्यां काय सांगावें तुम्हांसी। म्हणोनि निवांत मानसीं। तंव तुम्हांसी क्षोभ आला ॥६९॥

हे ऐकून जांबुवंत पुढे होऊन रामांची मूकसंमती असल्याचे सांगतो : याकरितां ऐकोनि वचनार्थ पुढें जाला जांबवंत। लक्षोनियां हनुमंत। स्वयें बोलत आवेशें ॥७०॥ हनुमंता सकळाविखीं[३] तुज व्युत्पत्ति आहे निकी[४]। स्त्रीपुरुषांची उखीविखी[५]। अनोळखी ते तुज ॥७१॥ स्वमुखें श्रीरघुपती। केंवी सांगे तुम्हांप्रती। मज भेटवावी सीतासती। म्हणोनि काकुळती तंव नये ॥७२॥ आपुलेठायीं आपण। विचार करावा पूर्ण। जानकीलागीं रघुनंदन। तनुसंकीर्ण[६] पैं झाला ॥७३॥ जीलागीं वधिला विराधू। खर दूषण त्रिशिरा बंधू। त्यांचा क्षणें केला वधू। तो निजवधू केंवी सांडी ॥७४॥ जीलागीं वधिलें मारीचासी। चर्म काढिलें कंचुकीसी। जिचेनि उद्धार जटायूसी। त्या जानकीसी केंवी सांडी ॥७५॥ जीलागीं वनोद्यान। हिंडता झाला रघुनंदन। तीतें सांडील आपण। सर्वथा जाण हें न घडे ॥७६॥ वाळी वधोनियां देखा। सुग्रीव जीलागीं केला सखा। ते जानकीतें देखा रघुकुळटिळकातें न सांडवे ॥७७॥ तुम्ही आम्ही सकळ वानर। जिचेनि व्याजें[७] श्रीरामकिंकर[८]। ते सीता सती सुंदर। श्रीरघुवीर केंवी सांडी ॥७८॥ जिचेनि शुद्धीसी रघुपती। तूंतें पाठविलें मारुती। शोधितां लंका पालथी। केली निश्चिती जीलागीं ॥७९॥ जीलागीं सागर गांजिला। शिळासेतु बांधिला। लंकेचा निरोध केला। रावण वधिला जीलागीं ॥८०॥ जिचेनि सुर तेहतीस कोडी। त्यांची सुटली बांधवडी। निजराज्याची उभवोनि गुढी। स्थापिला निरवडी[९] बिभीषण ॥८१॥

सीता - रामाची ताबडतोब भेट करावी : ते सती जनकदुहिता। सांडणे नघडे सर्वथा। सावध होई हनुमंता। भेटवीं सीता श्रीरामा ॥८२॥ आमचें सेवेचें पैं देख। हेंचि फळ अलौकिक। दोघां करावया मेळ एक। विचार आणिक असेना ॥८३॥ तिये वेळे निश्चित। स्वयें बोलिला श्रीरघुनाथ। जानकीये सांगावें हर्षित। जें लंकानाथ निवटिला ॥८४॥ याचे पोटीं ध्वनित। बोलोनि गेला रघुनाथ। सकळ झाला कार्यार्थ। भेटवा निश्चित जानकी ॥८५॥ हा अर्थ न कळे पैं तुज। स्वयें झालासि निर्बुज[१०]। भेटावया रघुराज। जनकात्मजा चालों द्या ॥८६॥ ऐकोनियां तें वचन। हनुमान घाली लोटांगण। तुम्हांहूनि अधिक ज्ञान। सर्वथा जाण मज

---

शब्दार्थ : १. सुखेकरून, २. उद्देश, ३. विषयी, ४. चांगली, ५. गुह्य गोष्टी, ६. शरीराने कृश, ७. मिषाने, ८. रामदूत, ९. पूर्णपणे, १०. कष्टी.

नाहीं ॥८७॥ बहुतांच्या मनासी आलें। तें मज सर्वथा मानलें। उचित पाहिजे केलें। तेंचि वहिलें करावें ॥८८॥ हनुमंताचेनि वचनें। हरिखलीं वानरगणें। देत नामांची किराणें। रामांगने नेवो पाहती ॥८९॥

विज्ञापयति वैदेहीं सुग्रीवोऽथ प्रणम्य च । द्रष्टुमिच्छति भर्ता त्वां रामो धर्मभृतां वरः ॥६॥
सुस्नातालंकृतामेव संयुक्तां प्रतिकर्मणा ॥७॥

बिभीषणादि सर्वजण सीतेला वंदन करून तिला रावण ठार झाल्याचे सांगतात : सकळ वानरांचा वर। किष्किंधेचा राज्यधर। पुढें होवोनि सुग्रीव वीर। नमन सत्वर पैं केलें ॥९०॥ अति विनति अत्यंत प्रीती । लोटांगणीं पुढतपुढती। अति मधुर वचनोक्ती। जानकीप्रती विनवित ॥९१॥ ऐकें जानकिये माते। श्रीरामवियोगें व्रतस्थें। जाळूनि सांडिलें देहभावातें। श्रीरामातें आठवितां ॥९२॥ त्यजिलें अन्न जीवन। त्यजिलें फळभोजन। त्यजिले भोग गहन। श्रीरघुनंदनवियोगें ॥९३॥ त्यजिले वस्त्रालंकार। त्यजिले अभ्यंगपरिकर। माथां वळला जटाभार। वल्कलांबरपरिधान ॥९४॥ रुधिर शोषलें समस्त। मांस आटलें जेथींचें तेथ। चर्म झालें अस्थिगत। श्रीरघुनाथवियोगें ॥९५॥ ऐसी उग्र तपश्चर्या। अतिअटक[१] सुरवर्या। तेणें तेजें रघुवर्या। संताप सबाह्य झाला असे ॥९६॥ जानकीवियोगविरहें पूर्ण। अति संतप्त रघुनंदन। करोनियां सेतुबंधन। वीर रावण निर्दाळिला ॥९७॥

सीताभेटीशिवाय रामांची शांती नाही : राक्षस कुळनिर्दळण। तुजलागीं केलें जाण। लंके राजा बिभीषण। झाला संपूर्ण तुझेनि धर्में ॥९८॥ अति दुर्जय त्रिजगतीं। विस्तारली श्रीरामकीर्ती। तथापि श्रीरामविश्रांती। नपवे निश्चितीं तुजवीण ॥९९॥ बिभीषण राज्यधर। प्रवेशला लंकापुर। श्रीरामें आज्ञोत्तर। तुज सत्वर पाठविलें ॥१००॥ माझे वियोगें गांजली। सीता अत्यंत कष्टली। अस्थिमात्र असे उरली। वेडी झाली मजलागीं ॥१॥ म्हणवोनियां तुजपासीं। वेगें पाठविलें आम्हांसी। बिभीषण स्थापावा लंकेसी। आणि जानकीसी आणावें ॥२॥

सालंकृत होऊन श्रीरामदर्शनास सत्वर निघावे : वंदोनि श्रीरामाज्ञापन। विलंब न करावा आपण। वेंगीं घ्यावें रामदर्शन। म्हणोनि चरणां लागला ॥३॥ करावीं अभ्यंगमार्जनें। दिव्यवस्त्रें परिधानें। विचित्र अलंकारभरणें। सुमनचंदनें अंगीकारीं ॥४॥ स्वामीचिया दर्शनासी। मलिन वेषें केंवी जासी। अंगीकारावें विनंतीसी। म्हणोनि चरणांसी लागला ॥५॥

श्रीरामदर्शनाशिवाय तैलाभ्यंजनादि गोष्टीला सीतेचा नकार : ऐकोनि त्याच्या वचनासी। हांसूं आलें जानकीसी। जवळी असोन अहर्निशीं। रामभजनासी अनोळख ॥६॥ श्रीरामेंवीण जें अन्न। तें केवळ विष्ठाभोजन। तांबूल तें रुधिरपान। साचार जाण सुग्रीवा ॥७॥ श्रीरामावीण उदकपान। तें मरणप्रद विष दारुण। जीवन त्यातें म्हणे कोण। सत्य जाण सुग्रीवा ॥८॥ श्रीरामवासावांचून[२]। इतर वास परिधान। तेणें व्यभिचार घडला पूर्ण। व्यभिचारिणी ते नारी।।९॥ श्रीरामतेजाहून इतर। अलंकार जे रत्नाकार[३]। शरीरीं केवळ तो भार। खदिरांगार[४] तैसे ते ॥११०॥ सुमनमाळा परिकर। ते माळा नव्हती सूचिकाग्र[५]। अभ्यंग चंदन परिकर। ते लेप साचार विष्ठेचे ॥११॥ ऐसें बोलतां जानकीसी। स्वेदाश्रु रोमांच सर्वांगासी। जानकीची निष्ठा कैसी। देहांत[६] भोगासी आतळतां[७] ॥१२॥ इतर जे रामसेवक। श्रीराम भजनीं अति दक्ष। जानकी त्यांचा आचार्य देख। निष्ठा अलोलिक दाखविली ॥१३॥

सीतेची रामांवरची अतूट निष्ठा पाहून सर्वांनीं तिला लोटांगण घातले : देखोनि तिच्या निश्चयार्था।

शब्दार्थ : १. प्रतिबंध, २. रामरूपी वस्त्रावांचून, ३. रत्नमय, ४. खैराच्या अग्नीचे निखारे, ५. सुईचे अग्र, ६. मरण, ७. स्पर्श केला तर.

आनंद सकळांचियां चित्ता। लोटांगणीं सादरता। चरणीं माथा ठेविला॥१४॥ श्रीराममहिमा अगाध। तैसीच जानकी अगाधबोध। निष्ठा अति विशुद्ध। सामर्थ्य शुद्ध जानकीचें॥१५॥ ऐसें करेनियां स्तवन। विनविते झाले सकळही जन। जैसें तुझें मनोज्ञ। तैसें निर्गमन करी माते॥१६॥ कायसी आमुची युक्ती। जे विनंती करूं तुजप्रती। जैसी तुझी मनोवृत्ती। तैसिये स्थिती भेट रामा॥१७॥

पालखीतून रामदर्शनार्थ सीतेने यावे अशी बिभीषणाची विनंती ऐकून त्याला सीतेचे समर्पक उत्तर: म्हणोनि राहिलों निवांत। तंव बिभीषण शरणागत। शिबिकेसहित आला तेथ। आरोहण येथें करीं माते॥१८॥ देखोनि त्याच्या आदरासी। जानकी बोले प्रतीतीसी। तूं जाणता भजनधर्मासीं। व्रत पाहसी तूं माझें॥१९॥ पारका पायीं राम सांपडे। तरी साधक कां शिणती बापुडे। ऐसें सर्वथा नघडे। जें राम सांपडे परके पायीं॥१२०॥ प्रवहणावरी[१] यात्रा करित। यात्रा श्रेय तें पैं नेत। कर्ता लटिकाची वल्गत। अभिमान वसत लौकिकीं॥२१॥ श्रीरामाची निजप्राप्ती। प्रवहणाची नलगे गती। परपायीं रघुपती। न भेटे निश्चिती कोणाही॥२२॥ पुढिलाचेनि भोजनें। तृप्ति नपवे निजप्राणें। तेंवी जाण परचरणें। रघुनंदन भेटेना॥२३॥ श्रीरामाची अंतरस्थिती। तो केंवी गावे प्रवहणगती। म्हणोनियां मुनिपंक्ती । नातळती यानासीं॥२४॥

असे बोलून सीता पायीच निघाली : ऐसें बोलोनियां सती। मस्तकांजली विनय वृत्ती। उठोनियां अति प्रीती। सहजस्थिती चालिली॥२५॥ पदसंचाराच्याठायीं। धरे सबाह्य राम पाहीं। देखोनियां लवलाहीं। देह देहीं नाठवे॥२६॥ जेंवी वायूचें चळण। सर्वत्र विचरे गगन। परी अंशही नव्हे भिन्न। गगनीं गगन होऊन राहे॥२७॥ जानकीच्या पाउलाची मोहर। लघुत्वें अति अरुवार। शून्यत्व सांडोनि साचार। पदसंचार श्रीरामें॥२८॥ अति अरुवार हंसगती। सवें हरिगणांची[२] संपत्ती। शीघ्र आली सुवेळेप्रती। निकटवर्ती श्रीरामा॥२९॥.

श्रीरामदर्शनानें जानकीची झालेली भावावस्था : देखोनियां श्रीरामचरण। आलें जानकींसीं स्फुरण। वेळोवेळां बाहुस्फुरण। रोमांची पूर्ण उभविली गुढी॥१३०॥ अंतरी सुखोर्मी दाटली। ते बाह्य चिद्रत्नें प्रकट झाली। अंगींची कांचोळी उतटली। पताकीं वहिली मंडित॥३१॥ जेंवी सूर्योदयीं कमळिणी। त्यजोनियां संकोच रजनी। अति संतोष विकासनी। दिनमणी देखोनियां॥३२॥ तेंवी सूर्यवंशदिनमणी। अद्वयाब्जविकासिनी[३]। श्रीराम देखोनियां नयनीं। जनकनंदिनी विकासत॥३३॥ सुप्रसन्न मुखकमळ। मुखचंद्र अति निर्मळ। टवटवीत तनु सोज्वळ। जनकबाळ सतेज॥३४॥ होतां सूर्यासमोर। सूर्यकांतीं वैश्वानर। भासे सकळां गोचर। पचनवेव्हार[४] संपादी॥३५॥ तेंवी देखतां रघूत्तम। जानकीची शोभा परम। भासे अति मनोरम। विश्रामधाम जगाचें॥३६॥ पुढें देखोनि राघव। अति आवेशें भरला जीव। समर्पीन सर्व भाव। म्हणोनि हाव उथळली[५]॥३७॥ म्हणे भाग्य आलें फळा। षण्मासांचा वियोग गेला। नमावया घनसांवळा। जनकबाळा अभिमानली॥३८॥

सीता समोर येताच रामांनी दुसरीकडे तोंड फिरविले. त्यामुळे सीता दुःखी : संमुख घालितां लोटांगण। न पाहेचि रघुनंदन। पूर्व सांडूनि अपूर्व जाण। करी वदन पश्चिमेकडे॥३९॥ उठोनि पाहे रामवदन। संमुख न दिसे रघुनंदन। स्वयें दक्षिणेकडे होऊन। केलें नमन श्रीरामा॥१४०॥ वाम सव्य दश दिशे। नमन करितां आवेशें। संमुख राम न दिसे। अति निःश्वासें स्फुंदत॥४१॥

अथैतां बाष्परुद्धाक्षीं संमुखें नाभ्यलोकयत्। अथ सा भूमिजा दुःखस्वरेण महताऽरुदत्॥८॥

---

शब्दार्थ : १. वाहनांत बसून, गार्डीत, वगैरे बसून, २. वानरसमूहाची ३. अभेदरूप कमलिनी, ४. पक्व करण्याचा व्यापार, ५. उपजली.

बाष्पव्याकुळताम्राक्षी मध्ये तेषां वनौकसाम्। तस्या विलपितं दृष्ट्वा सर्वे ते हरियूथपाः॥९॥
रुरुदुर्जातसंतापाः शोकव्याकुललोचनाः। मुखं वस्त्रेण संच्छाद्य सौमित्रिर्जातसंभ्रमः॥१०॥

श्रीराममुखदर्शन न झाल्यामुळे सीता स्वतःलाच दोष देऊन विलाप करिते: अतिदुःखेंकरूनि जाण। अश्रुपूर्ण आरक्त नयन। स्फुंदस्फुंदोनि करी रुदन। विमुख रघुनंदन मज झाला॥४२॥ दीर्घस्वरें आक्रंदत। मज न पाहे रघुनाथ। वृथा वांचोनि काय येथ। निंद्य जीवित रामविण॥४३॥ जेव्हांच वियोग रामासी। तेव्हांच सांडावें देहासीं। पापिणी मी ऐसी कैसी। देहभारेंसीं वांचलें॥४४॥ पृथ्वीयेमाजि पाहीं। पापें आहेत जीं कांही। श्रीरामवियोगें सर्वही। माझ्या देहीं आदळलीं॥४५॥ महापातकियाचें मुख। सवर्था राम न पाहे देख। मी केंवी आलें संमुख। प्राण निःशेख नव्हे माझा॥४६॥ पापांमाजि महापातक। मज घडलें आत्यंतिक। सौमित्र शापिला देख। श्रीराम विमुख तेणें झाला॥४७॥ अत्यंत अनुज आणि सखा। तो म्यां अभिशापिला देखा। कोण सुख रघुकुळटिळका। कासया मुखा अवलोकी॥४८॥

जानकीची मूर्च्छा, वानरांमध्ये हाहाकार : म्हणोनियां दीर्घस्वरीं। आक्रंदतसे सुंदरी। स्वयें पडतां धरेवरी। केला वानरीं हाहाकार॥४९॥ जीलागीं रघुनंदन। हिंडता झाला वनोवन। जीवीण न रुचे अन्नजीवन। समुद्रा पालाण[१] जीलागीं॥१५०॥ लंकेलागीं करोनि पूर्ण। दारुण येथ रणकंदन। जीलागीं वधून रावण। राजा बिभीषण जीलागीं केला॥५१॥ ते जवळी आलिया पाठीं। राम न पाहे दृष्टी। स्फुंदत पडलीसे गोरटी। श्रीराम पोटीं कठिण भारी॥५२॥

लक्ष्मणही शोकमग्न : देखोनि जानकीची अवस्था। सौमित्र वोसंडला[२] चित्ता। निजपालवें तत्वता। होय झांकिता निजवदन॥५३॥ पालवें झांकोनियां वदन। सौमित्र करीतसे स्फुंदन। अति कठिण रघुनंदन। अंतरचिन्ह कळों नेदी॥५४॥

श्रीरामांना विनवणी करण्यासाठीं उपस्थितांपैकी सर्वजण व स्वर्गांतील देवही तेथे येतात : श्रीराम नेदी समाधान। तेणें आवेशें पैं जाण। विनवावया रघुनंदन। अवघेजण सरसावले॥५५॥ अश्रु परिमार्जुन हातें। जानकीचेनि पक्षें तेथें। सकळ दुखावले निजचित्तें। विनवूं पाहती श्रीरामा॥५६॥ तंव स्वर्गीहून अवलीळा। आला सुरगणांचा पाळा। सिद्धगंधर्वयक्षमेळा। रघुकुळपाळा विनविती॥५७॥ एका जनार्दना शरण। जानकी देखोनियां जाण। राम झाला उदासीन। कांही वचन बोलेना॥५८॥ पुढें दिव्य[३] अद्भुत। जानकीये घेईल रघुनाथ। श्रोतीं अवधान द्यावें तेथ। कथा अद्भुत रामायणीं॥५९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां जानकीआगमनं नाम सप्तषष्टितमोऽध्यायः॥६७॥ ओंव्या॥१५९॥ श्लोक॥१०॥ एवं॥१६९॥

## अध्याय अडुसष्टावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### सीतेचे दिव्य

ततो वैश्रवणे राजा यमश्च पितृभिः सह। सहस्राक्षश्च देवेशो वरुणश्च जलेश्वरः॥१॥
त्रिशूलपाणिर्विश्वेशो महादेवो वृषध्वजः। कर्ता सर्वस्य लोकस्य ब्रह्मा च भगवान्प्रभुः॥२॥
स च राजा दशरथो विमानेनांतरिक्षगः। अभ्याजगाम तं देशं देवराजसमद्युतिः॥३॥
एते सर्वे समागम्य विमानैः सूर्यसंनिभैः। अभ्यभाषंत काकुत्स्थं मधुरं वाक्यगौरवात्॥४॥

कुबेर, यम, वरुणादि देवांसह दशरथांचे त्या ठिकाणी आगमन : वैश्रवण जो कुबेर। धनवंताचा

शब्दार्थ : १. आच्छादन, सेतू बांधणे, २. गहिंवरला, ३. शपथ.

राजा सधर[1]। भगवंताचा भांडारघर। तेथें सत्वर पातला॥१॥ अर्यमा पितरसमवेत। यम पातला प्रेतनाथ। सहस्राक्ष देवनाथ। मरुद्गणेंसहित पातला॥२॥ अपांपती अति वोजा। वरुण आला अमृतराजा। विनवावया रघुराजा। सीताकाजा पैं आले॥३॥ त्रिशूळपाणी वृषभध्वज[2]। गोक्षीरधाम[3] धवळ सहज। पिनाकयुक्त गणसमाज। साठीं सहस्रांसमवेत॥४॥ त्रिनेत्र पंचवक्त्र। दशभुजा अति परिकर। अर्धांगी गिरिजा सुंदर। अति मनोहर तेथें आला॥५॥ जो स्रजिता सकळांसी। पितामह म्हणती ज्यासी। तो सत्यलोकनिवासी। जानकीकाजासी ब्रह्मा आला॥६॥ रावण पार्षद वैकुंठींचा। श्रीरामें वध केला त्याचा। अधिकार पावोनि निजाचा। गेला जेथींचा पैं तेथें॥७॥

रावणाने वैकुंठात असलेल्या दशरथाला राम प्रताप निवेदन केला: तंव तेथें दशरथ। वैकुठीं देखिला नांदत। तेणें रावण आनंदभरित। ख्याति वानित रामाची॥८॥ सीताव्याजेंकरोनी। सागरीं शिळा तारोनी॥८॥ सीताव्याजेंकरोनी। सागरीं शिळा तारोनी। रामें वधिला दशाननी। अभिनव करणी पैं केली॥९॥ लंके अभिषेकिला बिभीषण। सोडविलें सीतानिधान। अतुलकीर्ती रघुनंदन। दाता समान अरिमित्रा॥११॥ रावणमुखें श्रीरामकथा। ऐकोनि आनंद दशरथा। पहावया श्रीरघुनाथा। सत्वर तो तेथें आला॥१२॥ शंकरादि देवांसमवेत। श्रीरामजनक दशरथ। ब्रह्मा इंद्र आले तेथ। जानकीचरित्र पहावया॥१३॥ सूर्यप्रभा समसमान। विमानें विमानीं पैं देदीप्यमान। अंतरिक्ष व्यापिलें गगन। श्रीराम आपण जेथें असे॥१४॥ ककुत्स्थकुळीं उत्पत्ती। म्हणोनि काकुत्स्थ रघुपती। नामनिर्देश निश्चिती। वेदश्रुतिपुराणें॥१५॥

सीतेसाठी ब्रह्मदेवाची श्रीरामांना विनंती: ब्रह्मा जो कां लोकपती। मस्तकांजली विनयवृत्ती। सकळ देवेंसी विनंती। सीताउद्देशें करीतसे॥१६॥ अति अक्षोभ्य सागर। शिळांनीं बुजोनि सत्वर। पराक्रमें वानरभार। क्षणें परपार पावविला॥१७॥ करोनियां महारण। इंद्रजित आणि कुंभकर्ण। रणीं निवटिला रावण। सकुळप्रधानसमवेत॥१८॥ बिभीषण लंकापती। जियेलागीं केला रघुपती। ते भेटलिया सीता सती। उपेक्षावृत्ती कां केली॥१९॥ राम भक्तजनवत्सल। ऐसा ब्रीदाचा कल्लोळ। तुझें अर्धांग जनकबाळ। उपेक्षाशीळ कैंवी रामा॥२०॥ क्षमा करीं रघुनाथा। कृपाहस्त ठेंवी माथां। वेगीं उठवावी सीता। विचार अन्यथा न करावा॥२१॥

श्रीरामांनी देवांच्या विनंतीलाहि प्रतिवचन न दिल्यामुळें वानरमंडळी खवळली : ऐसें ऐकोनियां वचन। उगाचि पाहत रघुनंदन। कांही नेदी प्रतिवचन। तेणें वानरगण खवळले॥२२॥ आधींच मर्कटें आळुकीं[4]। वरी संधि साधिली नेटकी। कोल्लाळ मांडिला सकळिकीं। कां हो जानकी उपेक्षिली॥२३॥ सुग्रीव राजा वानरनाथ। अंगद आणि जांबवंत। नळनीळादि बहुत। वानर समस्त बोलती॥२४॥ जिचेनि धर्मे श्रीरामा। स्वामी जोडला आम्हां। श्रीरामभक्ति प्लवंगमा। अगाध महिमा त्रैलोक्यीं॥२५॥ ते मुख्य सीता सती। जवळी असल्या रघुपती। उपेक्षिली निमेषगती। देवीं विनंती पैं करितां॥२६॥ तेणें वानरां भय संभवे। कैंवी करावें रामसेवे। जीव गेलियाहीं जीवें। धीर नव्हे भजनासी॥२७॥ उपेक्षिलें निजवधूसी। तो सेव्य कैंवी वानरांसी। श्रीरामसेवा करूं कैसी। वानरांसी भय भारी॥२८॥

अशा निर्वाणसमयीं बिभीषणाची रामांना प्रार्थना : थोर मांडिलें निर्वाण। हडबडिले[5] वानरगण। तें देखोनि बिभीषण। करोनि नमन विनवित॥२९॥ उपेक्षितां जानकीसी। भय सुटलें सकळांसी। राम कृपाळु विश्वासी। हें पुराणांसी मंडण[6]॥३०॥ उभारोनियां निजहस्त।

शब्दार्थ : १. समर्थ, २. बैलाचे ज्याच्या ध्वजावर चिन्ह आहे असा शंकर, ३. गाईंच्या दुधाप्रमाणे शुभ्रवर्ण ज्याचे स्थान आहे असा. ४. अस्थिर मनाची, ५. खवळले, ६. शोभा देणारे.

गर्जताती शास्त्रार्थ। राम कृपाळु निश्चित। वेदसंमत हे बोली॥३१॥ तीं ब्रीदें अंगीकारीं। जानकीतें कृपा करीं। तंव सौमित्र ते संधीमाझारीं। विनंती करी मधुरवाणी॥३२॥

लक्ष्मणाची प्रार्थना : विनविताहे शरणागत। तो मानावा वचनार्थ। तूं कृपाळु रघुनाथ। मनोगत[1] रक्षावें॥३३॥ ऐसें विनवितां समस्त। श्रीराम उगाचि तटस्थ। मग विनवी कपिनाथ। काय निवांत पाहसी॥३४॥ आकांत होतसे सकळांसी। आणि तूं निवांत मानसीं। निष्ठुर ऐसा कैसा होसी। जानकीसी प्राणांत॥३५॥ ऊठ चाल पाहसी काये। सीता मूर्च्छित पडली आहे। झणें तिचा प्राण जाये। करावें काय मग तेव्हां॥३६॥ ऐकोनि त्याचा वचनार्थ। हनुमान उल्लासें असे बोलत। स्त्रीपुरुषांचा जो एकांत[2]। त्याचा इत्यर्थ तुम्हीं केंवी जाणां॥३७॥ ऐसे बोलोनियां जाण। उठता झाला वायुनंदन। ज्याचें ऐकता वचन। श्रीरघुनंदन संतुष्ट॥३८॥ जो भक्तिसुखाचा सागरू। भजनधर्मासी सद्गुरु। निश्चयाचा महामेरु। धैर्य निर्धारु त्याचेनी॥३९॥ अबलांचें तरी जीवन। साधकांसी साधन। सिद्धासी समाधान। अमृता जीवन वचन ज्याचें॥४०॥

सीतेची बाजू घेऊन मारुतीचे श्रीरामांना सांगणे: प्रेमाचे उभाडे[3] देखा। देखोनि जानकीच्या दु:खा। देखोनि जानकीच्या दु:खा। जवळी येवोनि रघुकुळटिळका। सकळ लोकां देखतां॥४१॥ प्रीतिप्रेमाचे आवेशीं। तीक्ष्ण उत्तरें श्रीरामासी। बोलता जाला कुशळतेसी। जानकीपक्षासी घेवोनी॥४२॥ स्वामिसेवकांचे वचन। प्रीतिरोषयुक्त पूर्ण। प्रेमकलहाचें लक्षण। वदावया वदन मज कैंचें॥४३॥ दोहींच्या अंतरीं प्रवेशवे। तैं दोहींचें हरिद्र[4] जाणवे। हें असंभाव्य केवी संभवे। अंतर वदवे स्वामिसेवकांचे॥४४॥ परि सत्कुळाचें कुळवंत। पंचायतनींचें आदिदैवत। त्या सद्गुरूचें मनोगत। विचरे निश्चित मनामाजी॥४५॥ त्याची कृपा उपायदानें। असंभाव्य ही ये भावने। अचिंत्य आकळे चित्तचिंतनें। निर्विकल्प मनें कल्पवे॥४६॥ अलक्ष्य लक्षेंवीण दिसे। अमूर्तीची मूर्ति भासे। अवाच्याही शब्दासरिसें। सावकाशें बोलवे॥४७॥ शंखासुर श्रीअनंतें। निवटिला स्वसामर्थ्ये। कलेवर पिळूनि तेथें। निजहस्तें काढिलें॥४८॥ सर्वेचि प्रीतिपुर:सर। प्रसन्न होवोनि वेगवत्तर। हातीं घेऊनि कलेवर। ध्वनि विचित्र वाजवी॥४९॥ तोचि मजलागीं पूर्ण। अवतरला एकाजनार्दन। निवटोनि ममाभिमान। कलेवर जाण अंगीकारिलें॥५०॥ मन बुद्धी चित्ताभिमान। स्वयेंचि होवोनि आपण। गिरेमाजी प्रवेशोन। निजगुणवर्णन करीतसे॥५१॥ जेंवी शंखाचा उत्तम ध्वनी। संबंध नाही पांचजन्यीं। निघालिया कर्कश ध्वनी। लाज मनीं नाहीं शंका॥५२॥ तेंवी ग्रंथ सुरसविरसता। एकाजनार्दनाचे माथां। जैसे जैसे आवडे चित्ता। तैसी कथा वदतसे॥५३॥ यालागीं श्रोते जन। न ठेवावें भूषण दूषण। वक्ता एकाजनार्दन। कथाकीर्तन करीतसे॥५४॥ असो आतां परिहार। परिहार तोचि अहंकार। वक्ता एक एकांगवीर। वाग्व्यापार चाळित॥५५॥ पुढें श्रीराममारुती। बोलते जाले कवणे स्थिती। श्रोतीं अवधान द्यावें चित्तीं। दोघांची स्थिती अनुपम॥५६॥

जानकीविषयी श्रीरामांची उदासस्थिती पाहून मारुतीचे परखड विचार त्याने रामांना ऐकविले: उदास देखोनि रघूत्तम। खवळला तो प्लवंगम। बोलावया उपक्रम[5]। स्वयें सुवर्म[6] चाळित॥५७॥ इंद्र शंकर ब्रह्मादिक। नर वानर सकळिक। मस्तकांजळि देख। करिती आवश्यक प्रार्थना॥५८॥ अव्हेरून विनंतीसी। उपेक्षितां जानकीसी। बोल लागेल स्वधर्मासी। कठिणता अंगासी येईल॥५९॥ सर्वांतर्यामी श्रीराम। अरि मित्र सदा सम। तेणें सांडिला स्वधर्म। परम

---

शब्दार्थ : १. मानसिक धर्म, २. संकेत, ३. उमाळे, ४. मनातील गुप्त गोष्ट, ५. आरंभ, ६. गुह्य.

अधर्म मांडिला ॥६०॥ सती पतिव्रता जानकी। निष्पाप एक तिहीं लोकीं। श्रीरामें ते उपेक्षिली कीं। जघन्य[1] लौकिकीं वाढेल ॥६१॥ जीलागीं होवोनियां वेडें। सैरा वनोवन हिंडे। स्वयें वेंटाळून झाडें। वाडेकोडें सीताभावें ॥६२॥ जीलागीं वनांत। सैरा धांवे रघुनाथ। पाषाणातें आलिंगित। आतां होत उदास ॥६३॥ जियेचेनि वियोगबळें। चंद्रकिरणीं श्रीराम पोळे। सुमनमाळा अंगीं सळे। जैसें रुपलें सूचिकाग्र ॥६४॥ चंदनाचें उद्वर्तन[2]। अग्निस्फुलिंगवत्[3] जाण। वियोगें पूर्ण व्यापिलें मन। अवस्था दारुण जीलागीं ॥६५॥ सखा बंधु लक्ष्मण। त्यासीं मारूं धांवे आपण। सीतामय झालें मन। वियोगें पूर्ण व्यापिला ॥६६॥ दुर्जन अपवाद देख। जगीं बोलती अनेक। ऐसें जघन्य अलौकिक। माथां निःशंक वाजेल ॥६७॥ आणीकही अपूर्व श्रीरामा। विनवितां या प्लवंगमा। त्यांसी उत्तर न दैसी रामा। तेणें आम्हां भय भारी ॥६८॥ श्रीराम कृपेचा सागर। ऐसा ब्रीदाचा गजर। त्यावरी आला तमाचा पूर। कृपा समग्र वाहवली ॥६९॥ तरी हें आजि कळलें देखा। राम प्राकृत आम्हांसारिखा। राम आतुडला[4] विकल्पादिकां। ऐसें लोकां मानेल ॥७०॥ निरसावया संसार। सेवावा श्रीरघुवीर। तो राहिला पैं विचार। ऐसें समग्र मानिती ॥७१॥ सर्वस्व त्यागून वहिले। पोटीं पाले बांधिले। रामसेवे जीवित्व वेंचिलें। तें फळा आलें रोकडेंची ॥७२॥ सीताप्राप्तीलागीं येथ। बहुत कष्टला रघुनाथ। सैन्यासीं आहार पुरवित। भांतें घालित मोजमोजूं ॥७३॥ आपण मेळवावें फळ। सेवूनि भजावें अविकळ। अथवा सेवूनि असावें जळ। राम केवळ साधावया ॥७४॥ एकें बापुडीं वारियावरी। राहोनियां निर्धारीं। राम पाहती चराचरीं। भेटी तरी पैं नेदी ॥७५॥

श्रीराम निष्ठुर आहेत असे चराचर मानील म्हणून तसे न करिता जानकीची उपेक्षा करू नये म्हणून रामांना मारुतीने लोटांगण घातले : श्रीराम ऐसा निष्ठुर। म्हणोनियां चराचर। भयातीत पैं समग्र। केंवी रघुवीर सेवावा ॥७६॥ यालागीं सकळ जना। भय संचलें रघुनंदना। जेणें उपेक्षिली निजांगना। तो अबळा जना केंवी सेव्य ॥७७॥ ऐसें न करावें स्वामिनाथा। म्हणोनि चरणीं ठेविला माथा। आश्वासावी जनकदुहिता। निर्वाण आतां न पहावें ॥७८॥ ऐकोनि त्याच्या वचनार्था। आश्चर्य जालें रघुनाथा। निस्पृहें वरी तत्वता। नचले सत्ता कोणाची ॥७९॥ जे उदास देहावरी। स्वामित्वाची आज्ञा करी। उत्तर नेदी सुरासुरीं। तो कपिकेसरी विनवित ॥८०॥

स्त्रिया या कधीही विश्वासार्ह मानू नयेत असे श्रीराम मारुतीला सांगतात : झणें कोपसी हनुमंता। म्हणेनि नमन होय करितां। आठवावें पूर्ववृत्तांता। कोप तत्वता सांडूनी ॥८१॥ तुवां सांगितली होती जैसी। आम्ही देखत नाहीं तैसी। विश्वासों नये गा स्त्रियांसी। जरी मार्दवेंसी बोलत ॥८२॥ जो स्त्रियांचा विश्वास धरी। सद्यः अनर्थ त्याचे शिरीं। वाजोनियां क्षणाभीतरी। करी बोहरी व्रताची ॥८३॥ भगिनी अथवा दुहिता। एकांती न भेटावी सर्वथा। विपायें पैं भेटी होतां। तेथेंही सर्वथा विकल्प वाढे ॥८४॥ जवळीं असतां पतीसी। रिघोनि त्याच्या मानसीं। केव्हांचि विचरे आणिकासी। हें कोणासी लक्षेना ॥८५॥ मार्गी जाता पैं स्वभावें। व्यंकटकटाक्षासवें[5]। क्षणें पुरुषातें लोळवावें। कामभावें क्षोभवोनी ॥८६॥

यां दृष्ट्वा चित्तवैकल्यं स्पष्ट्वा सत्यांशसक्षयः। संभोगे मरणं याति सा स्त्री प्रत्यक्षराक्षसी ॥५॥

स्त्रीकटाक्षाचे दुष्परिणाम: दृष्टि पडतां अवचिती। सुरासुर मोह पावती। ते भेटलिया एकांतीं। कवणा विरक्ती उपजेल ॥८७॥ उभयवर्गामाझारीं। कामक्षोभ एका तऱ्हीं। येरयेरांची वृत्ती हरी। निंद्यसंचारीं प्रवृत्ते ॥८८॥ स्वभावें जरी दृष्टि पडे। तरी विरक्तीही क्षोभा चढे। कामफांसा

---

शब्दार्थ : १. निंदा, २ उटी, ३.अग्नीच्या ठिणग्यांप्रमाणे, ४. स्पर्शला, ५. वांकड्या कटाक्षांनी.

स्वयेंचि पडे। पडे सांकडें अनर्थी ॥८९॥ हें प्रत्यक्ष घडलें चंद्रचूडा[1]। भिल्लणी आली दृष्टीपुढां। महादेव झाला वेडा। केला उगाडा[2] विरक्तीचा ॥९०॥ पराशरें नावेभीतरी। देखोनि निषादकुमारी[3]। दिवसा करोनि अंधारी। तपसामग्री वेंचिली ॥९१॥ आणीक ऐसें सांगो किती। नागवले तपस्थिती। स्त्री भेटल्या एकांती। नव्हे विरक्ती पैं कोणा ॥९२॥

कामभावनेने रावणाने सीतेला नेली असल्याने तिला मी पवित्र कशी मानू ? श्रीराम : ही तंव केवळ कामभावें। नेली होती दशग्रीवें। ती निःसंग केंवी मानावें। रूपभावें मनोरम ॥९३॥ अति सुकुमार सुंदर। तरुणांगी लावण्यकर। कळा विन्यास[4] परिकर। मनोहर पैं रूप ॥९४॥ आणीकही ऐक कपिनाथा। पूर्वी तुवांचि सांगितली कथा। अस्थिमात्र जनकदुहिता। असे तत्वता पैं उरली ॥९५॥ रुधिर शोषिलें पैं समस्त। मांस आटलें जेथीचें तेथ। नामें वांचलेंसे जीवित। हर्षयुक्त सांगसी तूं ॥९६॥ तें न दिसे येथें कांहीं। अति विकसित दिसे पाहीं। रचिली असे ठायींच्याठायीं। अपूर्व कायी मी सांगों ॥९७॥ म्हणोनियां संदेहासी। कारण हनुमंता परियेसी। तंव कोप तुझे मानसीं। अति आवेशीं पैं आला ॥९८॥ तुज माझें लोटांगण। करून कोपाचें उपशमन[5]। सावध ऐकें माझें वचन। म्हणोनि विनवण करितसें ॥९९॥

''जनापवाद लागू नये म्हणून सीतेने दिव्य करून आपले पावित्र्य निरपवाद सिद्ध करावे.'' श्रीराम: जनापवाद कठिण भारी। दुर्नाम वाजेल माझे शिरीं। म्हणतील राम अविचारी। घातली घरीं कामलोभें ॥१००॥ तें चुकवावया हनुमंता। उपेक्षिली जनकदुहिता। तुम्ही सर्वज्ञ तत्वता। निजचित्ता विवंचा ॥१॥ मुख्य सीता अग्निमुखीं। ऐसें जाणोनि रघुकुळटिळकीं। ते भेटावया जानकीं। युक्ती निकी मांडिली ॥२॥ केंवी अपवाद चुकविजे। कोण योगें लोक समजे। हें विचारोनि कपिसमाजें। मग सांगिजे मजलागीं ॥३॥ अत्यंत कृपा सकळांसी। जें अंगीकारावें जानकीसी। तरी दिव्य सीतेपासी। सकळ समतेसी पैं मागा ॥४॥ सकळ लोकांदेखतां। दिव्य उतरलिया सीता। तरी मी अंगीकारीन तत्वता। विचार अन्यथा असेना ॥५॥

श्रीरामांच्या कठोर परंतु निश्चियी वाणीने सर्वांना अतीव दुःख : ऐकोनियां तें वचन। आंदोळिले त्रिभुवन। कठिण गिरा रघुनंदन। वाग्वज्रबाण मोकलिले ॥६॥ ऐकतां चळकांप चित्ता। भय सुटलें समस्तां। उपाय खुंटला सर्वथा। जनकदुहिता वांचेना ॥७॥ ऐसें मानोनि सकळिकीं। आशा सांडिली निःशेखीं[6]। होवोनियां अधोमुखीं। दुःखपंकीं निमग्न ॥८॥ कठिण ऐसें वाग्वज्र। ऐकोनियां हनुमान वीर। बोलों आदरिलें उत्तर। श्रीरघुवीर लक्षोनी ॥९॥

धीरवीर मारुतीने श्रीरामांना सीतेचे महिमान विशद केले : ऐकें स्वामी रघुनाथा। झणीं उपेक्षिसी सीता। पतिव्रतेचा विकल्प धरितां। निजव्रता बोल लागे ॥११०॥ सीतेचेनि तेजानळें[7] सहरावण पैं वहिलें। कटक अवघेंचि अहाळलें[8]। प्रेतरूप आलें युद्धासी ॥११॥ ससैन्य लंकानाथा। आपण वधिलें तत्वतां। ऐसें न मानावें रघुनाथा। वल्गोनि वृथा कार्य नाहीं ॥१२॥ सीतेनें मारिले नसतां। तुज न मरते रघुनाथा। मारीलेचि मारोनि तत्वता। जय सर्वथा तुम्हां दिधला ॥१३॥ रावणवधाचिये ख्याती। त्रैलोक्यीं पावन कीर्ती। जिचेनि प्रतापें त्रिजगतीं। तुमचें तुम्हांप्रती लक्षेना ॥१४॥ जिचेनि तुझी शौर्यशक्ती। जिचेनि तुझी शौर्यकीर्ती। ते समूळ जानकी चिच्छक्ती। जाण निश्चितीं श्रीरामा ॥१५॥ जिचेनि तुज नामरूप। जिचेनि प्रौढ प्रताप। जिचेनि रणीं साटोप। धैर्य अमूप जिचेनी ॥१६॥ ते तुझी निजशक्ति सीता। तुवां उपेक्षिली निजकांता। तेथें इतरांची कोण कथा। दीननाथा भजनमार्गी ॥१७॥ पूर्विल्याहूनि अनारिसी[9]। तुवां देखिली सुंदरवेषीं। अनोळख भक्ति चिन्हासीं। काय स्वामीसीं म्हणावें ॥१८॥ सूर्याचें सामर्थ्य गगनीं।

शब्दार्थ : १. शंकराला, २. नाश, ३. भिल्लाची कन्या, ४. विस्तार, ५. निरसन, ६. समग्र, निःशेष, सर्व, ७. तेजाग्नीने, ८. दाध झाले, ९. भिन्न, वेगळी.

स्वयें नेणे दिनमणी। तें जाणतसे कमळिणी। सुखविकासिनी पैं झाली॥१९॥ चुंबकाची चाळकशक्ती। स्वतां नेणे निजस्थिती। जडें लोहें सुखेंचि जाणती। ते चळण पावती दर्शनें॥१२०॥ चंद्रकिरणींची अमृतधार। स्वतां नेणें हिमकर[1]। सेवून जाणती चकोर। दर्शनें अपार नांदत॥२१॥ तैसी देखतां श्रीराममूर्ती। जरी उल्लास न बाणे चित्तीं। ते वज्राहूनि कठिण जाती। श्रीराममूर्ती अनोळख॥२२॥ स्वस्वरूपीं आराम। त्यातें बोलिजे श्रीराम। तें अंतरीचें निजप्रेम। सुखें परम ओतलें॥२३॥ अद्वैतीं सुखसंबंध। इंद्रियांवीण अगाध। विषयावीण परमानंद। तें स्वरूप शुद्ध तुझें स्वामी॥२४॥ त्या निजरूपातें देखतां। जरी उल्लास न बाणे चित्ता। इंद्रियें नव्हे पुष्टता। तरी ते वृथा पाषाणवत॥२५॥ तुझिया दर्शनाचें सुख। श्रीरामा तुज अनोळख। भक्त जाणती सात्विक। जे नैष्ठिक व्रतधारी॥२६॥ तुज देखतां रघुनाथा। अष्टौभाव सात्विकता। गुढी उभविली स्वानंदता। बाहेरी तत्वता ते आली॥२७॥ तेणें पुष्ट झाली सीता। ते देखतांचि रघुनाथा। विकल्प गमला तुझ्या चित्ता। अंतरव्रता नेणोनी॥२८॥ वेदपुराणसंमत। अंतर्यामी रघुनाथ। तें कांहीं न दिसे येथ। अंतरव्रत का न कळे॥२९॥ तरी भाग्य आपुलेंचि हीन[2]। जे अंतर नेणे रघुनंदन। सकळांला मी जो सर्वज्ञ। वेद वचन काय झालें॥१३०॥ आतां असोत या कथा। वर्म बोलतां रघुनाथा। प्रबळ शीण वाटेल चित्ता। आम्हा सीता काय होय॥३१॥ जेणें सुख स्वामीसी। तेंचि करणें आम्हांसी। सीतेची भीड ते कायसी। दिव्य जानकीसी पैं मागूं॥३२॥

केवळ रामांच्या संतोषासाठी मारुतीने सीतेजवळ येऊन तिला दिव्य करण्यास सांगितले : दिव्य उतरल्या सीता सती। जरी अंगीकारीना रघुपती। तरी देहपात करणें समस्तीं। आणीक युक्ती असेना॥३३॥ म्हणोनियां क्रोधावेषीं। आला जानकियेपासीं। ऊठ हो काय पडलीसी। दिव्य रामासी पैं देई॥३४॥

दिव्य करण्यास सीता तत्काळ तयार: ऐकतां हनुमानाचें वचन। जानकी झाली आनंदघन। मज वोळला[3] रघुनंदन। दिव्य आपण मागितलें॥३५॥ दिव्य न घेतां पैं येथ। मज अंगीकारीना रघुनाथ। लौकिकीं होतें विपरीत। जे विषयलुब्ध श्रीराम॥३६॥ अहंरावणाच्या घरीं। श्रीरामशक्ति सीता सुंदरी। राखिली होती षण्मासवरी। ते ये काळीं घरीं घातली॥३७॥ ऐसा जनापवाद होता। तो चुकविला हनुमंता। श्रीरामाची निर्विषयता। प्रकट तत्वता तुझेनि आजी॥३८॥ जानकीची निष्पापता। तुझेनि झाली वायुसुता। दिव्य मागतां रघुनाथा। देईन तत्वता सर्वांगें॥३९॥ दिव्य मागतां रघुनंदन। जेणें अंगें देईन जाण। तैंचि होईन पावन। निंद्य जाण पैं येर॥१४०॥ या कारणें सर्वांगेसी। दिव्य देईन श्रीरामासी। ऐसें बोलतां वेगेंसी। हनुमंत चरणांसी लागली॥४१॥ तुझेनि धर्में हनुमंता। आजि माझा उजळला माथा। विलंब न करीं सर्वथा। होई योजिता सामग्री॥४२॥

सीतेची आज्ञा ऐकून मारुतीने तिला वंदन करून प्रचंड असे अग्निकुंड प्रज्वलित केले : ऐकोनियां तें वचन। आलें हनुमंतासी स्फुरण। करोनि सर्वांगें निंबलोण। वंदिले चरण जानकीचे॥४३॥ दिव्य मागतां रघुनाथ। जानकीचें हर्षित चित्त। तेणें सुखमय हनुमंत। सामग्री योजित दिव्याची॥४४॥ श्रीरामआज्ञा तत्वता। सर्वांगें दिव्य देवों पाहे सीता। तो संपादावया हनुमंता। विचार चित्ता आठवला॥४५॥ विश्वाकार विषम[4] कुंड। हनुमंतें पेटविलें प्रचंड। देखोनि खळबळिलें ब्रह्मांड। अकांड तांडव मांडिलें॥४६॥ ज्वाळा लागती अंतराळीं। आकाश व्यापिलें ज्वाळीं। जवळी येवोनि जनकबाळी। कुंड न्याहाळी अति प्रीती॥४७॥

शब्दार्थ : १. चंद्र, २. उणे, ३. कृपायुक्त झाला, ४. अप्रसंगी.

सीतेला ते अग्निकुंड संपूर्ण अंतर्बाह्य राममयच भासले : तंव अपूर्व तेथें जालें। सबाह्य कुंड रामें व्यापिलें। तें देखोनि जनकबाळे। आश्चर्य वर्तलें निजचित्तीं॥४८॥ अभिनव लीला रघुपती। दिव्य घेतां मजप्रती। कुंडामाजीं निजस्थिती। अंतर वृत्ती पाहूं आला॥४९॥ येथें कायसा विचार आन। शुद्धभावार्थाचें प्रमाण। करोनियां अग्नीमाजी स्नान। श्रीरामचरण सेवावे॥१५०॥ ऐसा निश्चिय करोनि चित्तीं। रामांगना महासती। स्वयें प्रतिज्ञा झाली बोलती। सावध श्रोतीं परिसावें॥५१॥

मानसि वचसि काय जागरे स्वप्नमार्गे नहि वसति मनो मे राघवादन्यंपुसि।
सपदि दह ममांगं पापकृत् पावकेदं। सुकृतदुरितभाजां त्वं हि नः कर्मसाक्षी॥६॥

अग्निकुंडासमोर उभी राहून सीतेचे प्रतिज्ञेचे सहजोद्गारः राहोनि कुंडासमीप। श्रीरामभजनप्रताप। बोलती झाली आपोआप। सुखरूप श्रीराम॥५२॥ निजभजनमहिमान। निजस्थितीचें वर्णन। स्वयें बोलों नये आपण। परी न बोलतां जाण सरेना॥५३॥ पुसतां श्रीरघुनंदन। वंचूंही नये आपण। दिव्यसमयीं उच्चारण। केल्याविण सरेना॥५४॥ म्हणोनियां निजस्थिती। बोलती झाली सीतासती। अत्यंत नम्र अति प्रीती। अग्नीसी विनंती करीतसे॥५५॥ स्वामि परियेसीं तेजोराशी। तूं साक्षी सर्वकर्मांसी। अंतर सकळ जाणसी। जठरनिवासी जठराग्नी॥५६॥ अत्यंत चपळ शीघ्रगती। जेथें जेथें जाय मनोवृत्ती। तेथें तेथें रघुपती। चाळक स्थिती सांगातें॥५७॥ कल्पनेंचेनि योगें। मन जेथें जाय वेगें। राम सरसा पुढें मागें। परतोनि निघे तेथेंची॥५८॥

"रामांवाचून अन्य विषय माझ्या मनात क्षणभर जरी आला असेल तर हे अग्ने! मला तू दहन कर.": राम सांडोनियां मना। विषय जरी ये ध्याना। तरी देह हुताशना। करीं दहन क्षणमात्रें॥५९॥ व्यापार जे कां वाचिक। स्वर वर्ण उच्चारादिक। श्रीराम त्यांचाही चाळक। नुच्चारे देख रामेंवीण॥१६०॥ वाचेंसी वदविता राम। नित्य कथेसी मेघश्याम। रामेंवीण नाहीं उपशम[१]। वाग्विश्राम श्रीराम॥६१॥ वाचा भलतें अति वावडे[२]। परी रामेंवीण नवचे पुढें। श्रीरामेवीण उघडें। निजनिवाडें वचन नाहीं॥६२॥ तेथें सैराट[३] देतां हांका। हांकेमाजी राम नेटका। अनारिसें[४] होतां देखा। देवमुखा करी भस्म॥६३॥ हे काया जेथें आतळे। तेथेंचि श्रीराम मिळे। श्रीरामाहूनि वेगळें। नाहीं उरलें सर्वथा॥६४॥ दिसाताहे हा दिसे देहो। ऐसा बहुतांसी संदेहो। ते देहीं श्रीरामरावो। प्रकट पाहों दिसतसे॥६५॥ राम अवघे श्वासोच्छ्वास। राम पळ निमेषोन्मेष। श्रीरामीं पैं सावकाश। निजवास रामपणें॥६६॥ रामेंवीण शरीरा। क्षणही जाये आन[५] मोहरा[५]। ती देह वैश्वानरा। क्षणमात्रें भस्म करीं॥६७॥ शरीर वाचा मानस। त्रिविध प्राण सावकाश। तुजपुढें केला हुताश। श्रीराघवेश पावावया॥६८॥ कायिक वाचिक मानसिक। त्रिविध व्यवहार संसारिक। याचें प्रमाण केलें देख। ऐक आणीक सांगेन॥६९॥ जागृति सुषुप्ति आणि स्वप्न। त्यांची ते स्थिती संपूर्ण। याचा साक्षी तो रघुनंदन। ऐकें लक्षण पैं तेंही॥१७०॥ जागृती जें जें भासत। त्याचा प्रकाशक रघुनाथ। दृश्य द्रष्टा दर्शन तेथ। सहजचि होत श्रीराम॥७१॥ मावळोनियां जागृती। कल्पना वसे स्वप्नस्थिती। त्यातें भासविता रघुपती। जाण निश्चिती जठरेशा॥७२॥ निरसोनियां जागृती। उदैजतां स्वप्नस्थिती। मध्येंचि जे कां सुषुप्ती। जियेतें म्हणती गाढ मूढ॥७३॥ परी मूढता नाहीं ऐसी। केवळ सुखमय सर्वांसी। जागृतीच्या ज्या श्रमरासी। त्या सुषुप्तीसी निरसिती॥७४॥ नलगतां पैं सुषुप्ती। केवळ जे स्वप्नजागृती। ज्ञाते त्यातें दुखणे

शब्दार्थ : १. विश्रांती, २. फिरे, ३. गडबडीत, ४. भलतेच, ५. दुसऱ्या समोर.

म्हणती। सुखसंवित्ती[1] तेथें नाहीं॥७५॥ म्हणोनि सुषुप्ति सुखमय देख। श्रीराम त्याचेंही सोलींव सुख। श्रीरामाहूनि आणिक। नाहीं निःशेख पैं उरलें॥७६॥

**श्रीराम, देवब्राह्मण यांना वंदन व प्रदक्षिणा करून सीतेने अग्नीत प्रवेश केला:** श्रीरामासी प्रदक्षिण। करोनि नमिले देवब्राह्मण। करावया अग्नीमाजी स्नान। रघुनंदन विश्वमूर्ति॥७७॥ ऐसें परम प्रमाण सीता। बोलतांचि पैं तत्वता। सकळां झाली आश्चर्यता। परमावस्था हुताशीं॥७८॥ सीता बोलतां प्रमाणासी। न साहवे जठराग्नींसीं। साक्षी सांगावें सकळांसी। भेदोनि देहासी बाहेर आला॥७९॥ मंत्रबळें आहुती। जेंवी प्रवेश कुंडाप्रती। तेंवी निजसामर्थ्ये सीता सती। उडी घालिती पैं जाली॥१८०॥ सीता स्मरोनि रघुनाथ। उडी घातली अग्नीआंत। आकांतले सुर समस्त। केला निजघात जानकियें॥८१॥

**त्यामुळे एकच आकांत:** तेथें बुजालीं वानरें। भ्यालीं सकळ निशाचरें। सुरवरादि खेचरें। झालीं समग्रें भयभीत॥८२॥ कृपाळु श्रीरघुनंदन। सकळां निश्चिय होता पूर्ण। येव्हढें केलें निर्वाण। जीवावरी पूर्ण उठावला॥८३॥

**तेथे अग्नीच शांत झाला व सीता अग्नीप्रमाणे अति तेजस्वी भासली :** तंव आश्चर्य झालें तेथ। धगधगीत ज्वाळा समस्त। इंगळ[2] जे लखलखित। लोपोनि शोभत जानकी॥८४॥ तेथें तम धूमाचे घोळ। आणि रजरक्त कल्लोळ। ते लोपोनि सकळ। जनकबाळ देदीप्य॥८५॥ तेथें दहनदीप्तिरुखा[3]। मूळ ते जानकी देखा। अग्नीचिया निजशिखा[4]। त्याचि शाखा तया वृक्षा॥८६॥ सीता निजतेज कल्लोळें। पावकपाप निःशेष पळे। रावणबंदी जें घडलें। होते चैलें[5] पैं धुतां॥८७॥

**निर्दोष सीतेचा मोठा जयजयकार :** सीता पतिव्रता निर्दोष। अग्नि जाला पैं चोख। जयजयकारें करिती घोष। गर्जती अशेष हरिनामें॥८८॥ तें देखोनि श्रीराघवा। आकळिलें[6] अति कणवा। अवघेपणेंचि अघवा। आला खेंवा[7] स्वानंदें॥८९॥

**श्रीराम-सीता यांचे मिलन :** ऐसी प्रकृति पुरुषां भेटी। खेंवा[8] पडोनि पडली मिठी। हरपली उठाउठी। जिराली पोटीं येरयेरां॥१९०॥ तेथें योग वियोग कांही। स्मरणास्मरण तें नांहीं। बुझावण[9] झालें दोहीं। लवलाहीं दोन्हीपणा॥९१॥ श्रीरामरूपीं तत्वतां। मिळोनि गेली जनकदुहिता। न निवडे पैं सर्वथा। युक्ति विवरितां बहुविध॥९२॥ तेथें अशोकाचा शोक। वियोगभावनेचें दुःख। हरवोनि जंव म्हणे सुख। तंव म्हणते निःशेख हारपलें॥९३॥ ऐसा जीवशक्तिसंयोग। अभ्यासेंवीण महायोग। निःशेष कल्पनेवीण भोग। अति अव्यंग भोगिती॥९४॥ एकपणाचेनि आळें। सर्वथा नुरेचि वेगळें। श्रीरामरूपें सगळें। सामावलें एकाएकीं॥९५॥ एकाएकीं जनार्दनीं। सहजीं सहजचि मिळणी। प्रकृतिसहित जनक नंदिनी। रामचरणीं सरती झाली॥१९६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सीतादिव्यनिरूपणं नाम अष्टषष्टितमोऽध्यायः॥६८॥ ओंव्या॥१९६॥ श्लोक॥६॥ एवं॥२०२॥

## अध्याय एकूणसत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### दशरथाचे समाधान

**श्रीराम व जानकी यांची युती कशी दिसली :** जेंवी सुवर्ण आणि कांती। प्रभा आणि दीप्ती[10]। तेंवी सीता आणि रघुपती। स्वयें शोभती निजतेजे॥१॥ कापूर आणि द्रुती[11]। प्रकाश आणि

शब्दार्थ : १. सुखाचा अनुभव, २. निखारे, ३. वृक्षा, ४. ज्वाळा, ५. वस्त्रे, ६. व्यापिले, ७. आलिंगनाला, ८. क्षेमालिंगन, ९. समजूत, १०. प्रकाश, ११. वास.

ज्योती। भानु आणि दीप्ती। तेंवी भासती एकरूप॥२॥ साकरेमाजी गोडी देखा। सागरीं लहरींच्या झुळुका। तेंवी माजी रघुकुळटिळका। जनकदुहिता शोभत॥३॥ धात्याआंगी[१] सावित्री। उमा शंकरजानूवरी। रमा समीप मुरारी। तेंवी रावणारीजवळी जनकात्मजा॥४॥ जानकीयुक्त रघुनाथ। देखोनियां अति मंडित। सदैव त्रैलोक्यीं समस्त। आनंदभरित पैं जाले॥५॥

दिव्याच्या परीक्षेत सीता उत्तीर्ण झाल्यामुळे सर्वांनाच आनंद, देवांची पुष्पवृष्टी.: दिव्या उतरली जानकी। तेणें आनंद सकळिकीं। वानर नाचती हरिखीं। पुच्छ मस्तकीं उभवोनी॥६॥ घालिती उलटीं कोल्हाटे[२]। वृक्ष झेलिती वाडेंकोडें[३]। एक झेलिती पर्वतखडे। हरिखें माकडें नाचती॥७॥ नळनीळादि जांबवंत। हनुमान आणि सुग्रीव तेथ। येवोनि नमिला रघुनाथ। आनंदभरित सकळिक॥८॥ बिभीषणादि प्रमुख। सकळीं नमिला रघुकुळटिळक। सुर नर आनंदले आवश्यक। पुष्पवृष्टि देख तिहीं केली॥९॥ वानरराक्षसांचिये स्थानीं। माजि श्रीराम चूडामणी। समवेत जनकनंदिनी। पुष्पींकरोनी मंडित॥१०॥

दशरथ व देवादिकांना श्रीरामांचे नमन व सीतेला दिव्य करावयास लावले त्याचे स्पष्टीकरण: सकळ सभा पुष्पमंडित। देखोनियां रघुनाथ। मस्तकांजुळी अति विनीत। स्तवन करित देवांचें॥११॥ लोटांगण अति प्रीतीसी। ब्रह्मया आणि शंकरासी। इंद्रादिकां सकळांसी। नमन सावकांशी पैं केलें॥१२॥ लोटांगण दशरथासी। करून विनवी सकळांसी। क्षमा करावी मानसी। सर्वथा उदासी न व्हावें॥१३॥ उल्लंघोनि तुमच्या वचनासी। दिव्य मागितलें जानकीसीं। कोप न करावा तद्विषीं। माझें विनंतीसी परिसावें॥१४॥

अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभता। अशौचत्वं निर्दयत्वं स्त्रीणां दोषाः स्वभावजाः॥१॥

स्त्रियांचे स्वाभाविक सप्तदोष कोणते ?: भलतिया स्त्रियेचे देहीं। करणी न करितां कांही। स्वाभाविक गुण पाहीं। ऐका तेही सांगेन॥१५॥ अनृताची ओतिली राशी। सत्य येवों नेदी दृष्टीसी। रिघोनि पतीच्या मानसीं। स्वेच्छा आणिकांसी विचरत॥१६॥ मनीं उद्यमाची[४] ऐसी हांव। जे आकळीन ब्रह्मांड सर्व। तदर्थींचें युक्तिगौरव। अपार धांव मनाची॥१७॥ साहस करणें बहुत। तदर्थी शक्ति अद्भुत। इकडील तिकडे पर्वत। ठेवितां चित्त कष्टेना॥१८॥ वैसका[५] सांडावी पर्वतीं। उलथों शके क्षिती[६]। तरी विषयो धरिला चित्तीं। तो न सांडी भयलज्जा॥१९॥ हिताहित विचार। करणें नाहीं साचार। लोभें ओतिलें शरीर। क्रिया अपार मूर्खत्वाची॥२०॥ ममतेचें तरी अधिष्ठान। आचार तितुका लोभजन्य। सहसा उपरित[७] नाहीं जाण। अपार श्रवण जरी केलें॥२१॥ कल्पपर्यंत गंगेप्रती। असतां पाषाणाची स्थिती। तिळही न भिजे निश्चिती। तेंवी श्रवणस्थिती स्त्रियांची॥२२॥ शौच[८] त्यांचें केंवी सांगें। मद्याचा घट जेंवी गंगे। बुडवितांही सर्वांगें। नव्हे वेगें पैं शुद्ध॥२३॥ बाह्य दाविती आचार। अंतरीं वासना विचित्र। अहर्निशीं कामाचार। वृत्ति अपार सैरा विचरे॥२४॥ दयेचा तरी गंध नाहीं। कठिणताचि ओतिली देंही। विषयविषाद होतां पाहीं। डसे लवलाहीं घटीसीं[९]॥२५॥ माता पिता अथवा पुत्र। भ्रतार हो कां सहोदर[१०]। खुती[११] चुकतां अणुमात्र। घात सत्वर करूं पाहे॥२६॥ ऐसे स्त्रियेच्या देहीं। सहज गुण असती पाहीं। जनासी विश्वास न मने कांही। बहु उपायीं झाडा देतां॥२७॥ जानकीची निष्पापस्थिती। मीच जाणतों अंतरवृत्ती। इतरांसी यावया प्रतीती। दिव्य निश्चिती घेतलें॥२८॥ कपटबुद्धी दशग्रीवें। नेली होती कामभावें। तो परिहार[१२] केंवी संभवे। म्हणोनि दिव्यें अंगीकारिली॥२९॥ निष्पाप जाणावया जानकीसी। तुम्हींच

शब्दार्थ : १. ब्रह्म, २. गोलांट्या, ३. सहजी, ४. व्यापाराची, उद्योगाची, ५. अचळपणा, ६. भूमी, पृथ्वी, ७. विरक्ती, ८. पवित्रता, ९. गळ्याळा, मानेला, १०. बंधू, ११. अन्नवस्त्र, १२. निरास, निराकरण.

प्रेरिलें दिव्यासी। अधिष्ठानत्रय अंतरवासी। निजव्रतासी प्रेरक ॥३०॥ तुमचे आज्ञेवांचून। नाहीं करीत उदकपान। कोप न करावा आपण। आज्ञापन हें तुमचें ॥३१॥ केंव्हां आज्ञापिलें आम्हीं। तरी सांगेन ऐका स्वामी। इंद्रियांचें निर्गमागमीं। चाळक तुम्हीं सर्वथा ॥३२॥ कार्य कारण कर्तव्यता। मज तों नाहीं सर्वथा। तुम्हीं प्रेरूनि तत्वता। जनकदुहिता शुद्ध केली ॥३३॥ पृथक् पृथक् सांगों नांवें। तरी सर्वज्ञ तुम्हीं स्वभावें। मज सर्वथा उपसाहावें[1]। निजगौरवें क्षमावंती ॥३४॥

श्रीरामांच्या निवेदनाने संतुष्ट होऊन सर्वांनी त्यांची स्तुती वर्णिली: ऐकोनि श्रीरामवचना। आश्चर्य जालें सुरगणा। घालोनियां लोटांगणा। रघुनंदना विनवित ॥३५॥ जयजयाजी विशदबोधा[2]। विमलकीर्ति विद्यारविंदा। विश्वात्म्या विश्ववृंदा। विश्वातीता विश्वेशा ॥३६॥ विद्याअविद्यातीत। सकळशास्त्रां आदिभूत। शास्त्रीं संपादितां अर्थ। तो तू निश्चित श्रीरामा ॥३७॥ सर्वांतर्यामी शाश्वत। सकळ जाणता अंतर्व्रत। जनापवाद इत्थंभूत। स्वामी यथार्थ संपादिला ॥३८॥ जिचेनि नांवें विश्व मुक्त। जे रामीं नित्य रत। प्रातःस्मरणीं नित्य स्मरत। तिचा भावार्थ प्रकट केला ॥३९॥ इतर सकळ साधकांसी। आचार्या जाली परियेसी। निष्ठेची परी आहे ऐसी। दृढत्वें जगासी उपदेश ॥४०॥ अमलकीर्ति श्रीरघुनाथ। निर्मळ जानकीचें आचरित। सृष्टींत तुम्ही दोघे मंडित। कीर्ति अद्‌भुत त्रैलोक्यीं ॥४१॥

सीता लक्ष्मीर्भवान्विष्णुर्देवक्षकायुधः प्रभुः। वधार्थे रावणस्येह प्रविष्टो मानुषीं तनुम् ॥२॥
तदिदं नस्त्वया कार्यं कृतं धर्मभृतांवर ॥३॥

आपण उभयतां साक्षात् लक्ष्मीनारायण आहात : अस्मत्कार्यालागीं स्वामी। पूर्वी प्रार्थिलें होतें आम्ही। ते प्रार्थनेच्या उपक्रमीं। अवतार तुम्हीं दोघीं धरिला ॥४२॥ तें संपादावया इत्थंभूत। लक्ष्मी ते सीता निश्चित। आम्हांलागी कष्टली बहुत। कर्म देहांत आचरली ॥४३॥ मनीं न धरवे धरितां। चळकांप बोलतां चित्ता। तें कर्म जनकदुहिता। सुरकार्यार्था आचरली ॥४४॥ तूं श्रीविष्णु परमात्मा। मनुष्यनाट्या रघूत्तमा। अवतरोनि मेघश्यामा। राक्षसाधमा निवटिलें ॥४५॥ राज्यभोगा देवोनि पाणी। दुस्तर निष्ठा अंगीकारुनी। वनवासी जालां वनीं। पावन अवनी करावया ॥४६॥ निजांगें साहोनि कष्ट। कर्म केलें पैं अचाट। निवटिला दशकंठ। सुरसंकट निरसिले ॥४७॥ एतद्विषयीं दातारा। माथां घ्यावें उपकारा। सृष्टिरक्षणीं कळवळा पुरा। तुज रघुवीरा पहिलेंची ॥४८॥ तूं सकळांचा आदिकर्ता। तूं सकळां प्रतिपाळता। सृष्टिघातका लंकानाथा। क्षणें रघुनाथा निवटिलें ॥४९॥ हें नवल नव्हे जगजेठी। तुझी विक्षेप भ्रुकुटी। क्षणें निवटील सकळ सृष्टी। मारितां दशकंठी नवल कोण ॥५०॥ अनायासें रघुनाथा। कीर्ति केली जे तत्वता। उद्धारावया लोकां समस्तां। जाली सर्वथा जगद्वंद्य ॥५१॥

इममार्षं स्तवं दिव्यमितिहासं पुरात[illegible] ये नराः कीर्तयिष्यंति नास्ति तेषां पराभवः ॥४॥

तुझा दास रघुनाथा। वाल्मीक अनागतवक्ता[3]। तेणें गायिली जे कां कथा। ते यथार्थता संपादिला ॥५२॥ रामकथेवीण जगतीतळ। जालें होतें शून्यमंडळ। तें वसविलें सकळ। कीर्ति मंगळ करोनियां ॥५३॥

श्रीरामकथेचा महिमा : श्रीरामकथा विशुद्ध। ज्याचे वाचेसी ये सिद्ध। तो पावे अगाध बोध। परमानंद श्रीरामें ॥५४॥ जो परिसे एकाग्रचित्ते। निमग्न होय निजअर्थे। श्रीराम स्वयें तयातें। निजनिश्चितें स्वयें उद्धरी ॥५५॥ उद्धरी हा उद्‌गार पाहों । स्वयें न साहे रामरावो। अर्थ सबाह्य स्वयमेवो। आविर्भावो रामाचा ॥५६॥ अर्थरूप रघुनंदन। श्रोता वक्ता सबाह्य पूर्ण।

शब्दार्थ : १. क्षमा करा, २. स्पष्ट, निर्मल, ३. भविष्य सांगणारा.

स्वयें कोंदे पैं आपण। स्वानंदघन पूर्णत्वें ॥५७॥ असो श्रोत्यावक्त्याची कथा। रामकथेचा आदर धरितां। कलिकाळातें हाणोनि लाता। निजमुक्तता पाविजे ॥५८॥ कथेच्या ठायीं आदर। तरी श्रोते वक्ते जे नर। त्यांसी अनुमोदितां साचार। स्वयें रघुवीर सोडवी ॥५९॥ ऐसें देवोनि आशीर्वचन। देवीं स्तविला रघुनंदन। रामें घालोनि लोटांगण। सकळ सुरगण वंदिले ॥६०॥ करोनि सकळांचें स्तवन । सुखमय श्रीरघुनंदन। पुढें देखोनि हुताशन। करी विनवण तयाची ॥६१॥

भगवन्हव्यवाडीश लोकपावन पावक। शृणु मेऽस्याः परित्यागे कारणं त्वं विभावसो ॥५॥
जानाम्येनामहं साध्वीमनुरक्तां जितेंद्रियाम्। दृढव्रतसमाचारामात्मनः कर्मसंयताम् ॥६॥

श्रीरामांकडून अग्नीची प्रार्थना व वंदन : जेंवी कोणी प्राकृत जन। येरयेरांच्या उपकारें पूर्ण। परपस्परें करिती स्तवन। तेंवी रघुनंदन विनवित ॥६२॥ ऐकें स्वामी हुताशा। सकळजठर निवासा। कर्मसाक्षी कर्माध्यक्षा। सकळपाळका जठराग्नी ॥६३॥ सकळलोकपावना। ऐकें स्वामी हुताशना। जनकजेच्या महिमाना। सावधान परिसावें ॥६४॥ साध्वी परम पतिव्रता। अनुरक्त सती सीता। जितेंद्रिय पैं सर्वथा। हें मी तत्वता जाणतसें ॥६५॥ जानकीच्या सत्वेंकरून। पतिव्रता सतीत्व पूर्ण। निजसामर्थ्यें अति दारुण। स्वयें जाण आभासे[1] ॥६६॥ ते जानकीच्या संदेहो। मज सर्वथा नाहीं पहा हो। लोकप्रतीतीचा निर्वाहो। निःसंदेहो पैं केला ॥६७॥ जानकी पतिव्रता पूर्ण। तथापि तुवां रक्षिली जाण। सर्वांगें उडी घालितां आपण। व्हावें दहन तेणें काळें ॥६८॥ तुवां रक्षिली साचार। तेणें वांचली सुंदर। मज भेटली सत्वर। हा उपकार पैं तुझा ॥६९॥ तुझेनि धर्में हुताशनीं। भेटली जनकनंदिनी। म्हणोनियां लोटांगणी। घाली आपण श्रीराम ॥७०॥

सीतास्पर्शाने अग्नीचे धन्योद्गार व रामांना वंदन : तें देखतां हुताशन। आनंदमय होवोनि पूर्ण। लोटांगणीं रघुनंदन। स्वयें आपण विनवित ॥७१॥ ऐकें स्वामी रघुनाथा। निष्पाप तुझी निजशक्ति सीता। तिचेनि धर्में तत्वता। नित्यमुक्तता मज आली ॥७२॥ सीतेचेनि स्पर्शें सांग। त्रिविधताप[2] जाला भंग। निमाला माझा सकळ दाघ[3]। सुख अभंग पावलों ॥७३॥ अहं दुष्ट रावणमेळें। रजोरागें अत्यंत काममेळें। विषयभोगीं दृढ काटळे[4]। जग भेदिलें दोहीं सवां ॥७४॥ तितुके विटाळाचे मेळे। धुतां अत्यंत कष्ट जाले। बोली न बोलवे बोलें। देह जाले जर्जर ॥७५॥ ते सकळ कष्ट स्वामी । जानकीच्या पदसंगमीं। सकळ निस्तरलो आम्ही। जे कृतश्रमी न वचती ॥७६॥ जानकीचे पाय देखतां। सकळ मळाची क्षाळणता। स्वयें जाली रघुनाथा। बहुत आतां काय सांगूं ॥७७॥ माते जानकीचे संगतीं। सकळ मळाची जाली शांती। माझी उजळली निजदीप्ती। स्वप्रकाशस्थिती पावलों ॥७८॥ अभक्तांचा जठरपाक। करितां श्रमलों होतों देख। जानकीसंगें अलौकिक। विश्रांतिसुख पावलों ॥७९॥ ऐसी जानकीची स्तुती। करोनि नमिला रघुपती। तंव पुढें होवोनियां पशुपती। स्वयें विनंति करितसे ॥८०॥

शंकरश्चापि भगवान्प्रहृष्टेनान्तरात्मना। पुष्कराक्ष महाबाहो कृतं कर्म महत्त्वया ॥७॥
दिष्ट्या शत्रुर्हतः पापः सुराणां रावणस्त्वया। दिष्ट्या सर्वस्य लोकस्य प्रवृद्धं दारुणं तमः ॥८॥
त्वत्तेजसा विनिहतं राम रावणजं भयम्। आश्वास्य भरतादींश्च कौसल्यामभिवाद्य च ॥९॥
कैकेयीं च सुमित्रां च देवीं लक्ष्मणमातरम्। प्राप्य राज्यं प्रियं देव्या नंदयित्वा सुहृज्जनम् ॥१०॥

श्रीशंकरकृत रामस्तुती : शंकर म्हणे रघुनाथा। भाग्य फळासी आलें आतां। निवटिलें लंकानाथा। सुरां समस्तां सोडविलें ॥८१॥ मेघहुडे[5] येवोनि दारुण। जेंवी आच्छादिती

शब्दार्थ : १. विराजमान होते, शोभते, २. आधिदैविक, आधिभौतिक, आध्यात्मिक, ३. दुःख, ४. मळे, ५. ढगांचे बुरुज.

रविकिरण। तेंवी दुरात्मा रावण। सकळ सुरगण अवरोधी॥८२॥ बंदीं घातली सुरमांदी। तो दुष्ट दुरात्मा दुर्बद्धी। क्षणें वधिला बाणसंधी। कृपानिधी रघुनाथा॥८३॥ तुझ्या निजप्रतापकिरणें। उजळलीं सकळ भुवनें। उठविलें रावणाचें ठाणें। सुरगणा सोडविलें॥८४॥ तेणें आनंद सकळां। स्वस्थ स्थापिलें सुरकुळा। आलिंगिली जनकबाळा। अभिनव लीळा दावूनी॥८५॥ दिव्य घेवोनि रघुपती। विस्तारिली अभिनव कीर्ती। शेखीं विचारितां निश्चितीं। अग्निदीप्ती तेही तूं॥८६॥

आता अयोध्येत सत्वर जाऊन भरतादि सर्वांना संतुष्ट करण्याची रामांना श्रीशंकरांची विनंती : चरित्र केलें अत्यद्भुत। यश जोडिलें ब्रह्मांडांत। आतां न रहावे येथ। जावें त्वरित अयोध्येसी॥८७॥ तुझेनि व्रतें व्रतस्थ। बहु कष्टला भरत। जटा वळलिया अद्भुत। देह समस्त वाळिविला॥८८॥ तुझ्या पादुका रघुनाथा। नित्य वंदित भरत माथां। चित्तीं चिंतितां रघुनाथा। उसंत[1] भरता असेना॥८९॥ इंद्रिया नित्य दास्य परम। वाचेसी नित्य रामराम। हृदयीं श्रीरामाचें प्रेम। भक्तोत्तम पैं भरत॥९०॥ श्रवणीं नित्य रामकथा। नेत्रीं दृश्य[2] तत्वता। न देखे वांचोनि रघुनाथा। उसंत[3] भरता पैं नाहीं॥९१॥ करीं पादुका पूजितां। अति उल्लास भरता। अहर्निशीं रघुनाथा। बहु आस्था भेटीची॥९२॥ त्यासी द्यावें समाधान। तैसाचि दुसरा शत्रुघ्न। अवस्था भरताची समान। समाधान द्यावें त्यासीं॥९३॥ माता कौसल्या सुमित्रा। कैकेयी परम पवित्रा। जिणें धाडोनि वनांतरा। दशशिरा मारविलें॥९४॥ आणीकही दशरथकांता। तुजलागीं आस्थाभूता। त्यांसी भेटोनि रघुनाथा। सुख समस्तां पैं देयीं॥९५॥ पितृदत्त निजराज्या। भोगीं अभंग रघुराजा। सिंहासनमंडित वोजा[4]। निजभाजासमवेत॥९६॥ अयोध्येचे जन समस्त। तुझेनि वियोगें संतप्त। अति दुःखें पैं दुःखित। आठवित श्रीरामा॥९७॥ भरतादि सकळ लोक। तुजलागीं त्यक्तोदक। जेंवी मेघालागीं चातक। तेंवी सकळिक तुजलागीं॥९८॥ त्यांसी देवोनि समाधान। आनंदवावे सकळजन। मधुर गिरा प्रसन्न वदन। ऐसें त्रिनयन बोलिला॥९९॥ इक्ष्वाकुकुळवर्धना। सूर्यवंशनिजमंडना। तिघां मातांसी करोनि नमना। अश्वमेधयज्ञा संपादीं॥१००॥ करोनि सकळ दिग्विजयो। सुखी करीं समुदावो। अगाध दानें देवोनि पहा हो। सुखी भूदेवो[5] स्वयें करीं॥१॥ राज्य करोनि अविच्छिन्न[6]। सकळां द्यावें समाधान। नगरी विमानीं घालून। करावें गमन निजधामा॥२॥ जैसी केली विज्ञापना। तैशा स्थिती रघुनंदना। संपादोनि अविच्छिन्ना। यश त्रिभुवना संपादीं॥३॥

दशरथाचें आगमन : पैल पिता दशरथ। तुझी भेटी आकांक्षित[7]। अनुमोदोनि त्वरित। मनोगत संरक्षीं॥४॥ तुझी निजकीर्ति ऐकतां। उत्तम लोक दशरथा। प्राप्त असतां रघुनाथा। सांडूनि तत्वता येथें आला॥५॥ श्रीरामदर्शनापुढें। स्वर्गसुख तें बापुडें। परतलिया रामाकडे। सुखसुरवाडें[8] भोगिजे॥६॥ ऐकतां पुत्राची निजकीर्ती। आनंद दशरथाचे चित्तीं। राम सौमित्र सीता सती। पाहूं निश्चिती तेणें आला॥७॥ त्यासीं करोनि नमन। द्यावें पित्यासीं समाधान। ऐकोनि शंकरवचन। दशरथ आपण नमियला॥८॥

दशरथाला श्रीरामदिकांचे साष्टांग प्रणिपात: अंतरिक्ष गगननांतरी। ना समीप ना दूरी। राम पित्यातें नमस्कारी। सीतासुंदरीसमवेत॥९॥ सौमित्रें घातलें लोटांगण। तेणें दशरथा आनंद गहन। खोचोनि अंतरिक्ष विमान। मधुरवचन अनुवादे॥११०॥

> विमानशिरस्थस्य प्रणाममकरोत्पितुः। दीप्यमानं स्वयं लक्ष्म्या दिवाकरमिवोदितम्॥११॥
> लक्ष्मणेन सह भ्रात्रा ददर्श पितरं प्रभुः। आसीनमासने दिव्ये दिव्याभरणभूषितम्॥१२॥

शब्दार्थ : १. विश्रांती, २. सगुण, राममूर्ती, ३. अवकाश, ४. सुंदर, ५. ब्राह्मण, ६. संपूर्ण, ७. इच्छित, ८. अत्यंत सुखाने.

**हर्षेण महताविष्टो विमानस्थो महीपतिः॥१३॥**

**श्रीराम, सीता व लक्ष्मणाला पाहून दशरथाचा आनंदोत्सव :** देदीप्यमान विमानीं। मोक्षलक्ष्मी करोनी। दशरथ मंडित गगनीं। जेंवी दिनमणी आकाशीं॥११॥ अर्धांगी सीतासमवेत। विराजमान रघुनाथ। बंधुही लक्ष्मण तेथ। नमन करित पैं तिघें॥१२॥ तें देखोनि निजमानसीं। आनंद जाला दशरथासी। विमानीं नाचत हरिखेंसी। निजपुत्रांसी देखलिया॥१३॥ चिद्रत्नांचे अलंकार। विमानीं मंडित[1] नृपवर। हरिखें नाचत सत्वर। निजशरीर विसरोनी॥१४॥ नाम स्मरतां श्रीरघुनाथ। देहत्यागें वैकुंठांत। निमेष न लागतां प्राप्त। जालें त्वरित श्रीरामें॥१५॥ ज्याचेनि नामें निर्मुक्त। तो पुत्रत्वें नित्य क्रीडत। माझे घरीं अहोरात्र। भाग्य अद्‌भुत पैं माझें॥१६॥ ब्रह्मादिकां लक्षा[2] नये। तो पुत्रत्वें मजघरीं पाहें। निजानंदें क्रीडताहे। नवल काये सांगों मी॥१७॥

**पूर्वकृत्यांबद्दल दशरथाचे अनुतापाचे बोल :** तथापि केवढें औद्धत्य। पुत्रत्वें आज्ञापोनि तेथ। वना धाडिला रघुनाथ। निंद्य जगांत पैं जालों॥१८॥ स्त्रियेचिया वचनासाठीं। राम लाविला दिक्पटीं[3]। लौकिकीं विस्तारिली गोष्टी। निंद्य ललाटीं पीटलें[4]॥१९॥ परि तें हित जालें बहुतां। संपादिलें सुरकार्यार्था। द्विजां जाली सुखावस्था। आल्हादें वसतां जनस्थानीं॥१२०॥ राक्षस जे कां विश्वघातक। निवटोनियां सकळिक। देवाचा जो देवघातक। सकळघातक रावण॥२१॥ देवद्रोही विश्वद्रोही। ब्राह्मणांचा ब्रह्मद्रोही। तो रावण निवटोनि पाहीं। त्रैलोक्य सर्वही सुखी केलें॥२२॥ सुखी केले सुरवर। सुखी केले यक्ष किन्नर। सुखी केले वीर वानर। दशवक्त्र निवटिला॥२३॥ कैकेयीचें वचन निष्ठुर। त्रैलोक्यासी उपकारकर। सकळां जाले सुख अपार। बंदी समग्र सोडविले॥२४॥

**मनातील शल्य नाहीसे झाल्याबद्दल दशरथाला परमानंद :** माझे हृदयीं होती गोष्टी। कैकेयी दुराचारिणी मोठी। राम लाविला दिक्पटीं। सीता गोरटीसमवेत॥२५॥ तें शल्य[5] माझ्या हृदयींचें। आजि निरसोन गेलें साचें। चरित्र देखोनि श्रीरामाचें। आलें त्रैलोक्यींचें गौरव॥२६॥ तुम्हां त्रिवर्गातें देखोनि दृष्टी। आनंद उथळला पोटीं। एकला न माये सकळ सृष्टी। एवढी मज पुष्टी आलीसे॥२७॥ सीता सौमित्र श्रीरघुनाथ। विजयी त्रिवर्ग पैं येथ। देखतांचि अत्यद्‌भुत। आनंदभरित मी जालों॥२८॥ कैकेयीवचन शल्यदुःखा-। पासूनि आजि सुटलों देखा। देखिलिया रघुकुळटिळका। अनंत सुखा पावलों॥२९॥ श्रीरामा ऐक सावधान। धन्य भ्राता सौमित्र जाण। तुझें निजदास्य करोन। कीर्ति पावन त्रैलोक्यीं॥१३०॥ धन्य पतिव्रता सीता। तुझेनि दास्यें निष्पापता। तुझेनि धर्मे रघुनाथा। जगद्वंद्य माता जगाची॥३१॥ जितेंद्रिय सीता सती। निर्दोष यश त्रिजगतीं। अनुरक्त बंधु ऊर्मिलापती। स्वयें रघुपती घेवोनि जावें॥३२॥ वेदमंत्री अभिषेक। आपण करोनि सावकाश। सुख द्यावे बंधु भरतास। शत्रुघ्नास सुख देई॥३३॥

**भरतस्तु विनीतस्ते शत्रुघ्नो दयितो मम। भ्रातृभिः सह राज्यं च दीर्घमायुरवाप्नुहि॥१४॥**

**इति ब्रुवाणं पितरं रामः प्रांजलिरब्रवीत्। भोस्तातानुगृहीतोस्मि यत्प्रीतो मे भवान्गुरुः॥१५॥**

**इदमेकं त्विहेच्छामि भवतो हि वरं हितम्। दीयमानमभिप्रेतं ममानुग्रहकारणात्॥१६॥**

**'भरतादि अयोध्येतील नागरिकांस संतुष्ट करावे' - दशरथ :** भरत अत्यंत अनुरक्त। श्रीरामवियोगें व्रतस्थ। माथां जटाभार अद्‌भुत। प्रावरण[6] निश्चित वल्कलें॥३४॥ त्यजिला आहार विहार। सेजार केवळ वनचर। भूमिशयनी निरंतर। निजशरीर वाळविलें॥३५॥ भक्तिप्रतापें अति अद्‌भुत। भक्त अनुरक्त विरक्त। नित्य रामनाम स्मरत। वीर विख्यात पैं भरत॥३६॥ श्रवणीं

---

शब्दार्थ : १. सुशोभित, २. ध्यानांत, ३. दाही दिशांस, ४. आदळले, ५. दुःख, ६. आच्छादन, पांघरूण.

रामकथाचरित्र। रामरूप चराचर। नेत्रीं देखतां रघुवीर। वाग्व्यापार रामनामाचा॥३७॥ श्रीरामवियोगें तापला। तपश्चर्या कृश जाला। तैसाचि शत्रुघ्न निविळला[1]। प्रियकर भला पैं माझा॥३८॥ तैशाच तिघी तुझ्या माता। श्रीरामवियोगें व्रतस्था। बहुत शिणल्या रघुनाथा। भेटी तत्वता त्यांसी द्यावी॥३९॥ अयोध्येचे सकळ जन। नित्य चिंतिती रघुनंदन। नाठवे अन्न जीवन। अवस्था पूर्ण लागली॥१४०॥ जेंवी पर्जन्येंवीण धान्य। तृषित प्राणी जीवनेंवीण। क्षुधाक्रान्त स्मरे अन्न। तेंवी जन अयोध्येचे॥४१॥ त्यांसी द्यावें समाधान। पुत्रवत्प्रजापालन। सुखें करावें आपण। बंधूसीं जाण समवेत॥४२॥ निजराज्य भोगीं अक्षयी। ऐसें दशरथ बोलतां पाहीं। तिघे जाले सुखमयी। नमिला पाहीं निजजनक॥४३॥

''आपल्या पुण्याईमुळेच आम्ही यशस्वी झालो!'' असे राम दशरथास वंदन करून सांगतात : घालोनियां लोटांगण। मस्तकांजली विनीत वचन। ताता तुझेनि धर्मेकरून। सकळ कल्याण पावलों॥४४॥ आमचें जें कां उत्काटाचरित[2]। तो तुझा प्रताप निश्चित। तुझेनि धर्मे आम्ही सनाथ। ख्याती अद्भुत पावलों॥४५॥ तूंचि आमचा निज पिता। सद्गुरु तूंचि तत्वता। तुझेनि सकळ कृतार्थता। बहुत आतां काय सांगूं॥४६॥ स्वामींनीं आज्ञापिलें ज्या रीती। मी संपादीन त्याच स्थिती। चिंता न करावी निश्चिती। अनुज्ञास्थिती संपादीन॥४७॥ हेंचि उत्तरोत्तर मागत। तुमच्या अनुग्रहें निश्चित। तेणें सकळार्थ संपादत। आमुचें वृत्त तें किती॥४८॥ सकळांचे निजानुमतें। सपादीले सावचित्तें। तुझें अंतरंग निश्चितें। तें सर्वार्थे निजपुज्य॥४९॥ सखा विनीत बंधु भरत। शत्रुघ्न तुझा परम आप्त। राजपत्न्या तिघी तेथ। संतोषयुक्त करीन॥१५०॥

आपल्या आज्ञेप्रमाणेच सर्वांना संतोषवीन. रामः चिंता न करावी जी ताता। आज्ञेप्रमाणें यथार्थता। संपादीन मी सर्वथा। न करीं चित्ता विक्षेप[3]॥५१॥ पावोनियां उत्तम लोकासी। ममता नसावी मानसीं। तुम्हां शिष्टांची वचनें ऐसीं। सकळ लोकांसी उपदेश॥५२॥ पावोनियां उत्तम लोक। अहंममता धरिता देख। पुण्य वेंचे निःशेख। आवश्यक भूतळा येती॥५३॥ म्हणेनियां पुण्यश्लोक। अहंममता निःशेष। सांडोनियां उत्तम लोक। अक्षयी सुख भोगिती॥५४॥ ज्यांसीं गत्यंतराचें दुःख। तेही अहंममता निःशेख। सांडोनियां आवश्यक। ब्रह्मसुख भोगिती॥५५॥ जेथें नाहीं मीतूंपण। लोकलोकांतर नाहीं जाण। तेथें गत्यंतर[4] गणी कोण। गमनाभिमान सांडुनी॥५६॥ यालागीं चतुरीं। अहंममता सांडोनि दूरी। स्वयें ब्रह्मसाक्षात्कारीं। पावती उरी नुरवोनी॥५७॥

रामांच्या प्राजंळपणाने दशरथ संतुष्ट तो रामनाममहिमा सांगतो : ऐकतां श्रीरामवचन। दशरथ जाला सुखायमान। सांडोनियां निजाभिमान। ममता पूर्ण सांडिली॥५८॥ अहंममता सांडितां तेथ। पूर्णब्रह्म रघुनाथ। ऐसा बाणला निश्चितार्थ। आनंद अद्भुत उथळला[5]॥५९॥ पुत्रस्नेह सांडोनि तेथ। बद्धांजलि अति विनीत। सांगता जाला निजवृत्तांत । हृद्रत जें होतें॥१६०॥ पुत्रवियोगें रघुनाथा। तुझ्या नामाची दृढता। लागली अनिवार चित्ता। राम स्मरता देहांत॥६१॥ नामाचें फळ अलौकिक। नामें पावे उत्तम लोक। भोग भोगितां सकळिक। नाम निःशेख न विसरें॥६२॥ नामें जाला साक्षात्कार। प्रत्यक्ष भेटलासी तूं रघुवीर। ताप निमाला[6] समग्र। नाम साचार परब्रह्म॥६३॥ उत्तम लोकीं असतां। ममता होती रघुनाथा। पुत्र भेटावे तत्वता। ऐसी चिंता अनिवार॥६४॥ नावडे वैकुंठ कैलास। स्वर्गभोग पैं निःशेष। ममता होती बहुवस। ते अशेष निमाली॥६५॥ देखतां श्रीरामाची मूर्ती। ममता निमाली निश्चिती। निःशेष हारपली प्रकृती। चैतन्यस्थिती बाणली॥६६॥ निमालें मीतूंपण। मावळलें दशरथपण। मावळलें श्रीरामपण। ब्रह्म परिपूर्ण अद्वय॥६७॥ एका जनार्दना शरण। पितापुत्रांचें दर्शन । अहंममता

शब्दार्थ : १. शुद्ध अन्तःकरणाचा, २. मोठा प्रभाव, ३. अस्थिरता, ४. दुसरी स्थिती, ५. वाढला, ६. सरला.

सांडून। ब्रह्म परिपूर्ण प्रबोधिलें॥१६८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे। एकाकारटीकायां दशरथसमाधानं नाम एकोनसप्ततितमोऽध्यायः॥६९॥ ओंव्या॥१६८॥ श्लोक॥१६॥ एवं॥१८४॥

## अध्याय सत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### देवभक्तांची आनंदस्थिती

श्रीरामें विनवितां दशरथ। निश्चियें बाणला वचनार्थ। स्वयें मानोनि कृतार्थ। जाला विरक्त सर्वस्वा॥१॥ राज्यलोभ स्वर्गलोभ। पुत्रलोभ विषयलोभ। सांडूनि भुवनभोगलोभ। जाला निर्लोभ दशरथ॥२॥ अहंता आणि ममता। लोकलोकांतरवार्ता। गमनागमन पैं तत्वता। राया दशरथा पैं नाठवे॥३॥ नामरूपातीत। वर्णाश्रमधर्मातीत। जातिकुळगोत्रातीत। स्वयें रघुनाथ जाणितला॥४॥ श्रुति शास्त्रातीत। पूर्ण ब्रह्म रघुनाथ। रायें करितांचि इत्यर्थ। स्वयें तो अर्थ ठसावला॥५॥ लक्षूं जातां गुणातीतता। स्वयें ठसावे ते अवस्था। लाभे आपुली निजमुक्तता। गुणातीतता गुणांमाजी॥६॥ यालागीं मुमुक्षु सकळ। साधक जिज्ञासु प्रबळ। तेहीं सांडोनियां स्थूळ। मुक्त केवळ लक्षावा॥७॥ सांडोनियां कपट। धूर्तवाद वटवट। संत सेवितां निर्दुष्ट। निजमुक्ति स्पष्ट लाहिजे॥८॥ पुढील कथानुसंधान। मधुरवचनेंकरून। दशरथ ब्रह्मसंपन्न। केला आपण श्रीरामें॥९॥

दशरथाने लक्ष्मणाला परमार्थोपदेश केलाः होवोनियां ब्रह्मसंपन्न। पुत्रस्नेह सांडोनि पूर्ण। परमार्थे पैं लक्ष्मण। दशरथें आपण प्रबोधिला॥१०॥ अविकळ रघुनंदन। सेवितां कीर्ति पावन। पावला कीं अनवच्छिन्न[1]। सुमित्र जाण यथार्थ॥११॥ श्रीरामेंसीं सुष्ठु[2] मैत्री। करितां उद्धरली धरित्री। कीर्ति वानिजे सुरवरीं। भजनधात्री[3] झालासी॥१२॥ सकळ झाला सिद्धार्थ। मानूं जातां कृतार्थ। ऐसा न मानावा इत्यर्थ। अभिमानग्रस्त पैं होती॥१३॥ अंतरंग निजभक्त। भजनधर्मे सावचित्त। मजहूनि आन नाहीं आप्त। ऐसे संचरत मानसीं॥१४॥ ऐसा भाव उपजे चित्तीं। तेणें भजनाची होय शांती। धरी अहंकार उत्पत्ती। अधःपाती तो पावे॥१५॥ यालागीं साधुसंतीं। भजनीं न मानावी तृप्ती। पुनः पुनः रघुपती। सेवावा निश्चिती सर्वभावें॥१६॥ तृप्ति न मानोनि भजनासी। अविचळ[4] सेवितां रामपायांसी। जन्ममरणाची गोष्टी कायसी। ब्रह्मत्व अंगासी स्वयें ये॥१७॥ जेथे नाहीं मीतूंपण। तये स्वरूपीं ठेवोनि मन। सर्वकाळीं रघुनंदन। अनिमिष[5] जाण सेवावा॥१८॥ ऐसें सांगोनि सौमित्रासीं। स्वयेंचि सांगे जानकीसी। क्षोभ न मानावा मानसीं। रामें दिव्यासी घेतलें॥१९॥

पुत्रि वैदेहि मन्युस्तु नैव कार्यस्त्वयानघे। विशुद्धिरेषा सततं सर्वलोकेषु दर्शिता॥१॥
सदुष्करमिदं पुत्रि तव चारित्र्यलक्ष्मणम्। कृतं यत्तेन सुभगे यशः सत्यं भविष्यति॥२॥

जानकीला दशरथाचा उपदेशः विदेहाचें हृदयरत्न। वैदेही तुज अभिमान। देहभावाचा अणुरेण। सर्वथा जाण तुज नाहीं॥२०॥ तेणें विदेहभावेंकरून। सर्वकाळ अनवच्छिन्न। त्वां सेविला रघुनंदन। कीर्ति पावन जगद्वंद्य॥२१॥ देहीं नाहीं देहाभिमान। कर्मे नाहीं कर्माभिमान। विषयाच्या ठायीं ममताभिमान। सर्वथा जाण ज्यासी नाहीं॥२२॥ त्यासी करावया दहन। अग्नि बापुडें मशक कोण। हें करावया प्रकट चिन्ह। दिव्य संपूर्ण घेतलें॥२३॥ विदेहत्वें मज भेटतां। अग्नि जाळूं न शके सर्वथा। ऐसें कळावया समस्तां। श्रीरामें तत्वता घेतलें दिव्य॥२४॥

---

शब्दार्थ : १. अमर्याद, २. उत्तम प्रकारची, ३. भजनाचे पोषण करणारा, ४. अखंडित, ५. क्षणोक्षणी.

तूं रामाची निजशक्ती। प्रकाशावया आपली स्वरूपस्थिती। दिव्य घेतलें तुज हातीं। कोप सर्वार्थी न मानावा॥२५॥ पुढें याहूनि उत्तरोत्तर। श्रीरामें ख्यात तुझें चरित्र। महत्त्व पावसी थोर। जगदुद्धार तुझेनी॥२६॥ साधकीं साधावया निश्चिती। सौमित्र आणि सीता सती। अंगीकारितां याची स्थिती। साधक पावती श्रीरामा॥२७॥ असो आचरणस्थिती। तुमचे वर्णितां गुणकीर्ती। स्वयें उद्धरी रघुपती। भक्तकीर्ती श्रवण करितां। भक्ता आर्थी उद्धरी श्रोता। जो सादरता कथा ऐके॥२९॥ त्याकारणें सर्वथैव। सर्वकाळ सर्वभाव। अनवच्छिन्न[1] एकभाव। सर्वत्र राघव सेवावा॥३०॥ ऐसें सांगतां दशरथा। लोटांगण पैं तत्वता। विनविती झाली दशरथा। जनकदुहिता स्वानंदें॥३१॥

सीता व लक्ष्मण यांनी दशरथास लोटांगण घालून त्याचा आदेश शिरोधार्य मानला : सौमित्रेंसहित सीता जाण। कर जोडोनि आपण। दशरथासी विज्ञापन। जनकनंदिनी करीतसे॥३२॥ आज्ञापिलें स्वामिनाथा। त्या आचरणीं सामर्थ्यता। आम्हां कांहीं नाहीं सर्वथा। कर्ता करविता श्रीराम॥३३॥ पार्थिवाची[2] शरीरकृती। इंद्रियांची क्रियाशक्ती। मानसाची[3] कल्पनावृत्ती। स्वयें रघुपती वर्तवी॥३४॥ बुद्धीचा निश्चयो पूर्ण। अहंकाराचें अहंपण। स्वयें होवोनि रघुनंदन। करवी चळण आपणासी॥३५॥ आमच्याठायीं क्रियाशक्ती। अणुमात्र नाहीं भूपती। अंतर्यामित्वें रघुपती। वर्तवी निश्चिती आमुतें॥३६॥ जेंवी दारुयंत्र[4] खांबावरी। विविधा परी नृत्य करी। तें सामर्थ्य त्याच्या शरीरीं। तिळभरी असेना॥३७॥ सूत्रधाराचेनि छंदें। सुखें नृत्य करी विनोदें। ताल संगती पदबंधें। अतिआनंदें कुसरी[5]॥३८॥ तेंवी आमुतें रघुपती। स्वतां चेतवी निजशक्ती। आमुच्याठायीं क्रियाशक्ती। अणुही चित्तीं असेना॥३९॥ पुढेंही कर्ता करविता। श्रीरामचि तत्वता। तो ठेवील ज्या सत्ता। राहणें सर्वथा नृपवर्या॥४०॥ म्हणोनि घातलें लोटांगण। दोन्ही कर संपुट जोडून। तेणें दशरथ सुखायमान। रघुनंदन संतुष्ट॥४१॥

विमानमास्थाय महानुभावः श्रिया च संहृष्टतनुर्नृपोत्तमः।
आमंत्र्य पुत्रौ सहसीतया च जगाम देवप्रवरस्य लोकम्॥३॥

नंतर दशरथाचे विमानातून स्वर्गारोहण व इतर देवांकडून श्रीरामांना प्रार्थना : रामसौमित्रजानकीसीं। संतोषें अनुमोदोन तिघांसीं। नाम स्मरत संतोषीं। निघे विमानेसीं निजभुवना॥४२॥ सूर्यप्रभेसम विमान। निजकांती देदीप्यमान। मोक्षश्रिया विराजमान। स्वयें आपण दशरथ॥४३॥ स्वयें होवोनि ब्रह्मभूत। ब्रह्मानंदें डुल्लत। विमानी राजा दशरथ। निघे उपमत[6] निजाधामा॥४४॥ दशरथ स्वर्गभुवन। करितां अमरादि देवगण। मस्तकांजली आपण। केलें नमन श्रीरामा॥४५॥ अति विनीत तत्वता। विनविते जाले श्रीरघुनाथा। बहुत काय बोलूं आतां। बंदिमोचनता तुवां केली॥४६॥ येवढिया उपकारा उत्तीर्ण। व्हावया आमुचें तोंड कोण। आम्हां योग्य आज्ञापन। कांही आपण करावें॥४७॥

प्रतियाते तु काकुत्स्थे महेंद्रः पाकशासनः। अब्रवीत्परमप्रीतो राघवं प्रांजलिं स्थितम्॥४॥
एतस्मिन् तव किं कार्यं करोमि त्वत्प्रिये स्थितः॥५॥

देवमंडळी श्रीरामांकडे त्यांच्या सेवेची अपेक्षा करतात : स्वामी नरवीरपंचानना। कलापति कमलनयना। आम्हां होवोनियां प्रसन्ना। बंदिमोचना तुवां केलें॥४८॥ ऐसियांसीं आम्ही प्रसन्न। जालों म्हणों हेंचि दूषण। तथापि ऐकोनि विज्ञापन। कांही आज्ञापन करावें॥४९॥ जेणें सुख तुज उपजे। आम्ही लागों भजनवोजे[7]। ऐसें कार्य विचारिजे। जें रघुराजें कृपाळुवें॥५०॥ इंद्र

शब्दार्थ : १. सतत, २. पृथ्वीसंबंधी, ३. मनाची, ४. लांकडाची पुतळी, ५. प्रकाशवितो, ६. तत्काळ, ७. भजनमार्गाला.

वायु कुबेर चंद्र । अग्नि नैर्ऋत यमादि समग्र। लोटांगणीं अति तत्पर। श्रीरघुवीर विनविला॥५१॥ कांहीं आज्ञापीं आम्हासी। म्हणोनि लागले चरणासीं। तेणें सुख श्रीरामासीं। अति आवेशीं उथळलें॥५२॥

परंतु श्रीरामांनीच त्यांना चरणवंदन करून देवांच्या कृपेचा महिमा गायिला : अमरां देवोनि सन्मान। लोटांगणीं रघुनंदन । विनविता जाला आपण। सावधान अवधारा॥५३॥ स्वामी तुमचे कृपेस्तव। दुष्ट निर्दळिला दशग्रीव। तुमचे प्रसन्नतेचें वैभव। अति अपूर्व काय सांगूं॥५४॥ तुमचेनि नामें स्वामिया। यम काळ लागती पायां। त्या तुम्हातें सोडवावया। कोण साह्या येवों शके॥५५॥ स्वयें करोनि लाघव। मारविला दशग्रीव। अधिष्ठाते[1] तुम्ही सर्व। व्यर्थ राघव रूढवितां[2]॥५६॥ तुमची करणी समस्त। तुम्हीच उपकार मानित। प्रसन्न होवोनियां समस्त। मागा म्हणत मज स्वामी॥५७॥ इतर सकळ पदार्थ। तुमच्या कृपें पूर्ण भरित। जो आपुलें निजसामर्थ्य। मागा म्हणत मज स्वामी॥५८॥ जो आपुलें निजसामर्थ्यें। अनंत कोटि रची ब्रह्मांडांतें। तेथें उठवावया वानरांतें। श्रीरामांतें अटक[3] कोण॥५९॥ महत्त्व द्यावया सुरवरां। श्रीरामासी कळवळा पुरा। म्हणोनि इंद्रदिकां सुरां। अत्यादरा प्रार्थित॥६०॥

मम हेतोः परक्रांता गता ये यमसादनम्। ते सर्वे जीवित प्राप्य समुत्तिष्ठांतु वानराः॥६॥
विरुजान्निर्व्रणांश्चैव संपन्नबलपौरुषान्। गोलांगूलांस्तथा ऋक्षान्द्रष्टुकामः सुरेश्वरः॥७॥
अकाले चापि पुष्पाणि मूलानि च फलानि च। नद्यश्च विमलास्तत्र तिष्ठेयुर्यत्र वानराः॥८॥
श्रुत्वा तु वचनं तस्य राघवस्य महात्मनः। महेंद्रः प्रत्युवाचेदं वचनं प्रीतिसंयुतम्॥९॥
महानयं वरस्तात यस्त्वयोक्तो रघूत्तम। तद्युक्तमनुरूपं च कौसल्यानंदवर्धन॥१०॥

श्रीरामांची इंद्रादिक देवांना मेलेल्या वानरांना जिवंत करून भेट करवून देण्याची एकच प्रार्थना: मिळोनियां सुरगण। सकळ जालेति प्रसन्न। तरी ऐका विनगण। सावधान अति प्रीती॥६१॥ रावणासीं युद्ध करितां। वानरीं वेंचिलें जीविता। ते उठवावे मागुती आतां। स्वस्थावस्था निजशक्ती॥६२॥ युद्ध करितां समरांगणीं। जाली वानरांची भंगाणी[4]। धडें मुंडें विखुरलीं[5] रणीं। करचरणीं समवेत॥६३॥ रीस वानर गोळांगुळ। रणीं पडियेले बहळ[6]। ते उठवोनिया तत्काळ। मज सकळ भेटवावे॥६४॥ हेचि तुमची प्रसन्नता। पडलिया वानरां समस्तां। वेगें उठवोनि तत्वता। मज मागुती भेटवावें॥६५॥ माझीं मज वानरें। भेटती जेणें प्रकारें। तेंचि करावें दातारें। सर्व प्रकारें मज तुम्हीं॥६६॥ मज माझे वानरगण। तुम्हीं भेटविल्या आपण। पावली सकळ संभावन[7]। कृतकल्याण मी झालों॥६७॥ ऐसें विनवितां रघुनंदन। विस्मित झाले सुरगण। पूर्णब्रह्म रघुनंदन। आच्छादोन राहिलासे॥६८॥ त्याचा दास हनुमंत। चरित्र केलें अत्यद्भुत। आवरणभेदीं समस्त। वानर मृत उठविले॥६९॥ करितां श्रीरामाचें ध्यान। दृष्टी अमृत स्रवोन। उठविले वानरगण। अर्धक्षण न लागतां॥७०॥ तो येथें श्रीराम आपण उठवावया वानरगण। प्रार्थितसे सुरगण। भाग्य कोण आमुचें॥७१॥

ती विनंती म्हणजे देवांना महद्भाग्य वाटलें : म्हणोनियां सुरपंक्ती। सहित तेथें अमरपती। मस्तकांजलि रघुपती। झाले विनंती पैं करिते॥७२॥ सकळजनचाळका। सकळलोक-प्रतिपाळका। सुरवर संस्थापका। रघुकुळटिळका परियेंसीं॥७३॥ अंवचटें नाम पडतां कानीं। यम तयासीं न पाहे नयनीं। तें नाम जपतां अनुदिनीं। यमदंडणी कैंवी साहिती॥७४॥ नामापासीं भुक्ति मुक्ती। नामें जन्ममृत्यु नासती। तुझ्या नामीं नित्य विश्रांती। प्राणी पावती श्रीरामं॥७५॥

---

शब्दार्थ : १. अधिकारी, २. स्तविता, मोठेपणा देता, ३. संकट, अडचण, ४. मोड, ५. पसरली, ६. पुष्कळ, ७. स्वागत, देणगी.

ऐवढें तुझें नाममहिमान। तों तूं प्रत्यक्ष रघुनंदन। असतां बापुडें काळ कोण। हरिगण निवटाया ॥७६॥

तुझ्या नामाचे सामर्थ्य जरी अगाध असले तरी तुझी आज्ञा म्हणूनच आम्ही वानरांना जिवंत करू: तथापि तुझें आज्ञापन। कोण करूं शके आन। सकळ उठती वानरगण। अर्धक्षण न लागतां ॥७७॥ आज्ञेंप्रमाणें सकळ। सिद्धि पावेल अविकळ[1]। सर्वकाळ फळ जळ। वानरदळ सुखमय ॥७८॥ अंगीं न दिसें घाववण। नाठवे तयां युद्धत्राण। सुषुप्ती उठे शयनींहून। तेंवी वानरगण उठतील ॥७९॥ म्हणोनि सरसावले सर्वही। निज अवयवांचें ठायी। प्रवेशोनि लवलाहीं। वानर पाहीं उठविले ॥८०॥

ठार झालेल्या वानरांना देवांनी जिवंत केले. अवयवांवरून वानरांत भांडणे : अवयव भिन्न भिन्न झाले। करचरण बिघडविले। ते आपेंआप विहिले। लागों लागले जेथींचे तेथे ॥८१॥ पुच्छ उसळोनि देखा। लागों पाहे जंव एका। तंव दुजा करी आवांका। कोठें जासी देखा म्हणवोनी ॥८२॥ एकीकडे ओढी एक। दुजेकडे ओढिती अनेक। तिजा म्हणे उजू ओळख। तें पुच्छ देख पैं माझें ॥८३॥ एकाचे तुटले चरण। ते स्वयें उमगितां जाण। मध्येंचि हिरोन ने आन। येर थोडआन[2] पैं राहे ॥८४॥ आपुले घ्यावया पैं जाण। छिन्नपाद नाहीं आंगवण। श्वासोच्छ्वास घालोनि पूर्ण। थोटवोन पैं राहे ॥८५॥ मस्तक उथळलें रणभूमीं। निज कबंध[3] जंव आक्रमी[4]। तंव तें पडे अति दुर्गमीं। अति विषमीं पाडिजे ॥८६॥ केश धरोनि ओढी एक। कान धरोनि ओढी आणिक। शिर मध्येंचि लोंबें देख। एक एका वानरें ॥८७॥ एक म्हणती माझें शिर। दुजा म्हणे परता सर। तिजा म्हणताहे मर मर। आपपर नोळखसी ॥८८॥ एक एकाचा ओढी कर। एक एकाचें ओढी शिर। येरयेरांचे अपार। चरण सत्वर ओढिती ॥८९॥

वानरांची लीला पाहून श्रीरामादिक सर्वांना हसू आले : येरयरांचें पुच्छ आंसुडिती। आपुलाले ढुंगी कोंदिती। ते देखोनि रघुपती। स्वयें हांसती स्वानंदें ॥९०॥ सौमित्र आणि सीता सती। सुग्रीव जांबवंत मारुती। अंगदादि सकळ जुत्पती। अवघे हांसती गदगदां ॥९१॥ अकळ श्रीरामाचें चरित्र। शरण येवोनि सुरवर। स्वयेंचि उठविती वानर। आपुलें अंतर कळों नेदी ॥९२॥ ऐसा करितां गदारोळ। गात्रे सांधिलीं सकळ। घायवण न दिसे अळुमाळ। सैन्य सकळ उठविलें ॥९३॥ अंगी घाव न दुखतां। वणही न दिसे सर्वथा। सांडोनियां सुषुप्तावस्था। उठती तत्वतां ऐसें जालें ॥९४॥

अव्यंग झालेल्या वानरांकडून श्रीरामांना प्रणिपात : लाहोनि अविकळ शरीर। रामानामें अपार। देती किराणें वानर। येवोनि रघुवीर नमिताती ॥९५॥ श्रीराम देतां आलिंगन। वानरां आनंद गहन। नाठवे तेथें निज स्मरण। घाववण नाठवे ॥९६॥ नाठवे वानरां वानरपण। नाठवे श्रीरामा रामपण। श्रीराम वोळला[5] चिद्धन। स्वानंदपूर्ण वानरा ॥९७॥ प्रयासें सुटली मिठी। परी दोघां दोपणाची गोष्टी। अल्पही स्फुरेना पोटीं। अकळ गोष्टी रामाची ॥९८॥ केव्हां मारिलें दशवक्त्रें। केंव्हां उठविलें रघुवीरें। दोन्ही नेणती वानरें। अकळ चरित्रें रामाचीं ॥९९॥ येरीकडे सुरगण। ब्रह्मादि त्रिनयन। सकळ लोकपाळ मिळोन। करिती विनवण श्रीरामाचें ॥१००॥

देवांकडून श्रीरामांची स्तुती व अयोध्येला जाऊन सर्वांना सुखी करण्याची रामांना कळकळीची विनंती : वंदीमोचन करोनि वहिलें[6]। रावणमुखींचें काढिलें। आम्हां स्वपदीं स्थापिलें। सुखी केलें श्रीरामा ॥१॥ अहंरावणग्रस्त। देहदरिद्रें पीडित। होतों बहुसाल कष्टत। केलें निर्मुक्त तेथूनी ॥२॥ सुखी केलें आम्हांसी। तैसेचि तुझ्या अंतरंगासी। वेगीं जावोनि अयोध्येसी। सुखी सकळांसी करीं स्वामी ॥३॥

---

शब्दार्थ : १. भरपूर, २. थोटा होऊन, ३. मस्तक तुटलेली धडे, ४. ओढिती, ५. कृपायुक्त झाला, ६. ताबडतोब.

मैथिलीं सांत्वयस्वैनामनुरक्तां यशस्विनीम्। भरतं भ्रातरं प्राज्ञं शत्रुघ्नं च महाबलम्॥११॥
समेत्य पितृबद्धालं त्वं लालयितुमर्हसि। कृतकर्मा परिश्रांतः सुखं प्रप्रोतु लक्ष्मणः॥१२॥
समाप्तवनवासस्त्वमात्मानमभिषेचय। एवमुक्त्वा समामंत्र्य रामं सौमित्रिणा सह॥१३॥
विमानैः सूर्यसंकाशैर्जग्मुर्हृष्टाः सुरा दिवम्। अभिवाद्य काकुत्स्थः सर्वांस्तान्त्रिदशेश्वरान्॥१४॥

हे तुझी निजशक्ती। साध्वी अनुरक्त महासती। केवळ तपाची तपोमूर्ती। तुझी ख्याती जिचेनि॥४॥ समाधान दे सीतेसी। स्वयें सुख द्यावें तिसी। तैसेंचि बंधु सौमित्रासी। अति प्रीतीसीं सुख देईं॥५॥ अति कष्टला वनांतरीं। अति प्रीतीं निराहारी। अनिमिष तुझी सेवा करी। ब्रह्मचारी नैष्ठिक॥६॥ नेणे आहार सेजार[1]। श्रीरामसेवेंसीं तत्पर। परी राक्षसांचा संहार। प्रताप साचार पैं तुझा॥७॥ अति कष्ट करोनि जाण। अत्यंत कष्टला लक्ष्मण। त्यासी द्यावें समाधान। प्रीति करून श्रीरामा॥८॥ तैसेंचि भरतशत्रुघ्न। श्रीरामभजनीं प्रेमा पूर्ण। दृढव्रत तुजलागून। अनवच्छिन्न[2] करिताती॥९॥ तुझे वियोगें रघुनाथा। तुच्छ केली शरीरावस्था। सुखावीं त्या शत्रुघ्नभरतां। श्रीरघुनाथा अत्यादरें॥११०॥ समस्ताही तुझ्या माता। प्रधाना सुमंता। अयोध्याजनां समस्तां। परमावस्था[3] पैं तुझी॥११॥ पितृवत् प्रजापालन। स्वामी करावें आपण। आपणा करोनि अभिषिंचन। व्रतविसर्जन वनवासा॥१२॥

**देवगण स्वर्गाला निघाले :** ऐसें विनवोनि सुरगण। श्रीरामासी प्रदक्षिण। सकळीं घालोनि लोटांगण। निजधामा आपण निघाले॥१३॥ सूर्यप्रभेसमान। विमानीं बैसोनि देदीप्यमान। श्रीरामाचें गुणवर्णन। करीत आपण निघाले॥१४॥ वचनीं श्रीरामवर्णन। मनीं श्रीरामाचें ध्यान। सर्वां भूतीं रघुनंदन। देखतां सुरगण सुखमय॥१५॥ करितां रामकथाश्रवण। नित्य तृप्त सुरगण। श्रीरघुनाथें सुखसंपन्न। निजधामा आपण सुखें गेले॥१६॥ येरीकडे श्रीरामचंद्र। राक्षसादि महावीर। वैरी निरसोनि समग्र। सकळांसी सुखी केलें॥१७॥ शरत्काळींचा निशाकर[4]। सवेग निरसोनि घनाकार[5]। निर्मळत्वें जें अंबर। अति परिकर शोभवी॥१८॥ राक्षसमेघांचिया हारी। निरसोनि क्षणाभीतरीं। श्रीरामचंद्र सैन्यामाझारीं। अति कुसरीं शोभत॥१९॥

**श्रीरामांकडून सीतेचे मृदु शब्दात सांत्वन:** जवळी बोलावोनि सीता गोरटी। हातीं धरोनि हनुवटी। शांतवनाच्या मधुर गोष्टी। राम जगजेठी संबोखी[6]॥१२०॥ विषाद[7] न मानावा सुंदरी। तुझें चरित्र जगदुद्धारी। जे दाविली भजनपरी। ते उद्धरी जगातें॥२१॥ जिहीं देखिलें तुझें चरित्र। ते उद्धरिले साचार। पुढें ऐकती उत्तरोत्तर। ते संसारपार पावती॥२२॥ दिव्य घेतां तुजपासीं। उभयतां निंद्य जगासी। तें चुकलें अनायासीं। कोप मानसीं न मानवा॥२३॥ जैंपासोनि वियोग तुझा। तैंपासोनि देह माझा। कांहीं केल्या नये काजा। एवढा तुझा वियोग॥२४॥

**सीतेच्या विरहाने काय स्थिती झाली ते श्रीराम सीतेला सांगून तिला प्रेमालिंगन देतात :** उदकपान पैं करितां। घोटामाजीं आठवे सीता। फळभोजन करूं जातां। जनकदुहिता ग्रासीं दिसे॥२५॥ जागृति स्वप्न सुषुप्तीं। सीतामय झाली वृत्ती। हें सांगितलें असेल मारुतीं। बहुत किती अनुवादों॥२६॥ म्हणोनियां अति प्रीतीं। आलिंगिली सीता सती। तंव सीतेमाजी रघुपती। निजस्थिति हारपला॥२७॥ श्रीरामा नाठवे रामपण। तंव येरीकडे झालें आन। सदेह जानकी आपण। श्रीरामीं जाण बुडाली॥२८॥

**श्रीराम- सीता एकींएक होऊन गेले :** लवणजळा होतां भेटी। हरपती येरयेरां पोटीं। तेंवी श्रीराम जगजेठी-। माजी गोरटी हरपली॥२९॥ दोनी दीप एक होती। दोनीपण जावोनि एकदीप्ती। तेंवी सीता आणि रघुपती। एकत्वें शोभती देदीप्य॥१३०॥ न होवोनियां दुजेपण।

**शब्दार्थ :** १. शयन, २. एकसारखे, ३. अत्यंत काळजी, ४. चंद्र, ५. मेघाकृती, ६. उपवासी, ७. दुःख.

दोन्ही दोपणीं होती भिन्न। तेंवी सीता आणि रघुनंदन। आलिंगन सुटलें॥३१॥ सुटोनियां आलिंगनीं। जानकीयें श्रीरामचरणीं। मौनेंचि मस्तक ठेवोनी। मधुर वाणीं अनुवादे॥३२॥

सीतेने लज्जित होऊन रामांना वंदन केले : प्रीतींकरोनि लज्जान्वित। विनविती झाली रघुनाथ। अंतर्यामीं तूं निश्चित। कर्ता करविता तूंचि तूं॥३३॥ सकल इंद्रियां चाळकता। तुझेनि स्वामी रघुनाथा। अंतर्बाह्य तुझी सत्ता। कर्ता करविता तूंचि तूं॥३४॥ ऐसें बोलोनि सुंदरी। लोटांगण चरणावरी। घातलें अतिथोरी। नामें वानरीं गर्जिजे॥३५॥

ते श्रीराम-सीतेचे प्रेममय मीलन पाहून सर्व सभेने रामांचा जयजयकार करून नामसंकीर्तनानें आनंदोत्सव केला : सुखमय सभा सकळ। बिभीषण सुग्रीव वानरदळ। रीस आणि गोळांगुळ। नामें प्रबळ गर्जती॥३६॥ नामें कोंदला भूगोळ। नामें कोंदलें पाताळ। रामें संबोखिली जनकबाळ। आनंदकल्लोळ सकळांसी॥३७॥ आनंदमय रघुपती। आनंदमय सीता सती। आनंदमय जुत्पती। सकळीं रात्र क्रमियेली॥३८॥ तंव उजळलें उखामंडळ। प्राची[1] झाली पैं निर्मळ। निजकर्मी लोक सकळ। अधिकारशीळ लागले॥३९॥ दिशा चोखाळल्या समस्त। झाले पांथिक मार्गस्थ। सदाचारकर्मी प्रवर्तत। उद्धरण करित अग्निहोत्री॥१४०॥ उपासक बैसले पूजनीं। योगी प्रवर्तले ध्यानीं। उठले वैष्णव गजरेंकरोनी। नामसंकीर्तनीं गीतवाद्यें॥४१॥ वानर उठले समग्र। करीत नामाचा गजर। भुभुःकारें गर्जे अंबर। प्रभाकर उगवला॥४२॥ राक्षसराजा बिभीषण। निजानंदें परिपूर्ण। पूजावया रघुनंदन। पूजोपचार घेऊन पैं आला॥४३॥

तां रात्रिमुषितं रामं तथैव व्रतमास्थितम्। अब्रवीत्प्रांजलिर्वाक्यं जयं दृष्ट्वा बिभीषणः॥१५॥

बिभीषण व त्याच्या स्त्रियांची व्रतसमाप्ती करण्याची रामांना विनंती : वनवासाचें दृढव्रत। संपादावया सुरकार्यार्थ। धरिलें होतें अति नियत[2]। तो कार्यार्थ साधिला॥४४॥ मस्तकांजलि अति विनीत। लोटांगण घालोनि तेथ। बिभीषण शरणागत। श्रीरघुनाथ विनविला॥४५॥ निवटोनियां लंकानाथ। बंदी सोडविले समस्त। आतां विसर्जावें व्रत। अत्यद्भुत धरिलें जें॥४६॥ सौमित्र गांजला अन्नेंवीण। उपवासीं अति खिन्न। महासती जानकी जाण। अतिक्षीण पैं झाली॥४७॥ विसजावें वनवासव्रत। जटाबंधनें करावीं मुक्त। लोटांगणीं श्रीरघुनाथ। निजस्त्रीसमवेत नमियेला॥४८॥ बिभीषणाच्या स्त्रिया। पूजासामग्री घेवोनियां। पूजूं आलिया श्रीरघुराया। निजजायासमवेत॥४९॥ तिहीं घालितां लोटांगण। उचलोनियां रघुनंदन। अति प्रीतींकरोनि पूर्ण। समाधान दीधलें॥१५०॥ सकळ झालें निष्कंटक[3]। लंकेचें राज्य अलौकिक। निजपतीसहित देख। तुम्हीं आवश्यक भोगावें॥५१॥

रामांकडून बिभीषणाला वरदान : म्हणोनि माथां ठेविला हात। जंववरी शशिभास्वत। गगनीं असे वर्तत। तंव लंकेआत राज्य करीं॥५२॥ ऐसें देतां वरदान। येरीं माथां वंदिले चरण। विनविताहे बिभीषण। तें विज्ञापन मानावें॥५३॥ परिस स्वामी श्रीरामा। बिभीषण शरण आला तुम्हां। तेव्हांचि अक्षयी राज्य आम्हां। श्रीरामधर्मा विनटल्या॥५४॥ शरण जातां श्रीरामासी। अक्षयी राज्य बिभीषणासी। अक्षयी चुडेदान आम्हांसी। तुझें तुजपासीं काय सांगूं॥५५॥ लोटांगण श्रीरघुनाथा। विनवितादि लंकेशवनिता। बहुत कष्टली सती सीता। अभ्यंगार्था आज्ञापीं॥५६॥ बिभीषणें त्याच रीतीं। विनविला श्रीरघुपती। स्वामी परिसावी विनंती। व्रतसमाप्ती करावी॥५७॥ ऐसें प्रार्थितां बिभीषण। संतोषला रघुनंदन। मृदु मंजुळ वचन भक्तशांतवन करीतसे॥५८॥ एकाएकीं मधुरवाणी। धर्मशास्त्रार्थ नीतिवचनी। श्रीरामें बिभीषणालागोनी। लंकाभुवनीं पाठविला॥५९॥ एकाएकीं जनार्दनी। धन्य कथा रामायणी।

शब्दार्थ : १. पूर्व, २. तत्परतेने, अव्यंग, ३. शत्रुरहित.

धन्य भाग्याची मांडणी। ऐकतां श्रवणीं रामकथा॥१६०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे। युद्धकांडे एकाकारटीकायां देवभक्तआनंद योगो नाम सप्ततितमोऽध्यायः॥७०॥ ओंव्या॥१६०॥ श्लोक॥१५॥ एवं॥१७५॥

## अध्याय एक्काहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः॥

### त्रिजटेचे दर्शन

प्रतिगृह्णीष्व तत्सर्वं मदनुग्रहकांक्षया। मुनिवेष्ठं समुत्सृज्य राज्यार्थमनुभूयताम्॥१॥

एवमुक्तस्तु काकुत्स्थः प्रत्युवाच बिभीषणम्। धर्मज्ञं धर्मविद्वाक्यं न्यायज्ञो न्यायकोविदम्॥२॥

लोटांगणीं बिभीषणें। विचित्रालंकार भूषणें। विचित्र रत्नें विचित्र वसनें। आणिलीं आपण पूजेसीं॥१॥ विचित्र पूजेची सामग्री। घेवानि बिभीषण विनंती करी। सहित जानकी सुंदरी। पूजा अंगीकारीं मत्प्रीतीं॥२॥ मजवरी अनुग्रह[1] पूर्ण। त्याचें फळ हेंचि जाण। यथासामर्थ्यें पूजाविधान। आणिलें प्रीतीनें अंगीकारीं॥३॥ सांडोनि मुनिवेषासी। अंगीकारीं राजचिन्हांसी। जेणें सुख होय आम्हांसी। तें प्रीतीसीं आचरावें॥४॥ निजभक्ताचें मनोगत। संरक्षावें यथातथ्य। हेंचि तुझें निजव्रत। तें साद्यंत सांभाळीं॥५॥ म्हणोनि घातलें लोटांगण। दृढ धरिले दोन्ही चरण। तेणें कळवळला रघुनंदन। काय आपण अनुवादे॥६॥ लौकिकनीतिशास्त्रप्रयुक्तीं। मंजुळ वचनें रघुपती। स्वयें बिभीषणाप्रती। काय विनंती करीतसे॥७॥

उपपन्नामिदं राजन्मयि कल्याणचेतसि। सौहार्दे वर्तमानस्य ग्राह्यश्च प्रणयान्मया॥३॥

मामनुव्रतचारी च भरतः कैकयीसुतः। शत्रुघ्नसहितो विद्वान्मदाराधनलालसः॥४॥

राज्यश्रियं परित्यज्य मुनिवेषधरः किल। तपस्तप्यति मे भ्राता नंदिग्रामकृतालयः॥५॥

भरताची भेट घेतल्याशिवाव राज्याभिषेकादि गोष्टीस रामांचा नकारः ऐक लंकाधिपति नृपवरा। तूं मज निजाचा सोयरा। तुझेनि धर्में दशशिरा। बाणधारा निवटिलें॥८॥ जो अजेय त्रैलोक्यासी। बंदीं घातलें सुरवरांसी। अदट[2] कर्म जयापासीं। तो बाणें एकेंसीं निवटिला॥९॥ एवढें कर्म दारुण। तुझेनि धर्में साधिलें पूर्ण। त्या तुझें निजवचन। केंवी उल्लंघन करूं शकें॥१०॥ परंतु तुवांचि निजचित्तीं। विचारावें यथानिगुतीं[3]। भरत सांडोनि अयोध्येप्रती। व्रतसमाप्ती केंवी करणें॥११॥ सांडानि आहारविहार। तुच्छ करोनि राज्य समग्र। भूमिशायी[4] वल्कलांबर। व्रत घोर अंगीकारिलों॥१२॥ सांडोनि आस्तरणप्रावरण। राज्यभोग पैं संपूर्ण। अयोध्ये न वचे मजवीण। सिंहासन न पाहे॥१३॥ कैकेयी माता अति प्रीतीं। शिकवितांही नाना युक्तीं। राज्या न शिवेचि हातीं। धैर्यमूर्ति पैं भरत॥१४॥ चित्रकूटाच्या ठायीं। शिकविला बहुसाल मींही। राज्य देतां लवलाहीं। प्राणावरी पाहीं उठावला॥१५॥ प्राण त्यागितां भरतासीं। तेथें आला वाल्मीक ऋषी। समजावितां आम्हां दोघांसी। वाल्मीकासी अति कष्ट॥१६॥ मी न सांडीं वनवास। भरत अंगीकारीना राज्यभारास। तेणें काळें अनागत[5] भाष्य। ऋषीनें भरतास सांगितलें॥१७॥ वनवासींचें सकळ चरित्र। भरता सांगितलें समग्र। तेणें काळें महावीर। दुःखें तत्पर परतला॥१८॥ करोनियां अति निर्वाण। भरतें वाहिली आण। श्रीरामावांचूनि आपण। राज्यभुवन न पाहें॥१९॥ मागोनि माझ्या पादुका। मस्तकीं बांधिल्या देखा। अयोध्ये न येतां रघुकुळटिळका। सर्वथा देखा उतरींना॥२०॥ माझीं वनवासाचीं व्रतें। तितुकीं अंगीकारिलीं भरतें। शत्रुघ्नहीं तैसींच तेथें। कठिण व्रतें आचरत॥२१॥ तिघी

शब्दार्थ : १. कृपा, २. भयंकर, ३. बरोबर, ४. जमिनीवर निजणारा, ५. पुढील.

आगळया[1] शतें सात। माझ्या माता तळमळित। अयोध्येचे जन समस्त। आर्तभूत[2] मजलागीं ॥२२॥ राजधानी सांडूनि वहिला। भरत नंदिग्रामीं राहिला। त्यासी उपेक्षोनि मला। अभिषेक भला केंवी माने॥२३॥

भरतभेटीवाचून राज्याभिषेक ही धर्मनीती नव्हे: धर्मनीति नव्हे ऐसी। जगीं होईल उपहासी[3]। म्हणोनि विनवितों तुम्हांसी। दुर्निमित्तासी चुकवावें॥२४॥ जें मज अपेक्ष जघन्य[4]। तें तुम्हांसी नव्हे मान्य। याकारणें तुम्हीं आपण। जघन्य सांडावें॥२५॥ म्हणोनि घातलें लोटांगण। क्षमा करावी मज संपूर्ण। आम्हांसी द्यावें आज्ञापन। करावें गमन लंकेसीं॥२६॥ सुख द्यावें प्रजांसी। सुख द्यावें विश्वजनासी। सुख देवोनि कलत्रपुत्रांसी[5]। निजराज्यासी भोगावें॥२७॥

अयोध्येला जाण्यासाठी श्रीरामांची उत्कंठा : माझे मन उत्कंठित। बंधु माता सुहृद समस्त। गुरुदर्शनालागीं बहुत। उत्कंठित मन माझें॥२८॥ मज दिधलिया आज्ञापन। सकळ पावलें पूजाविधान। स्वयें मानोनि समाधान। क्षमा आपण करावी॥२९॥

अनुजानीहि मां सौम्य पूजितोऽहं बिभीषण। मन्युः खलु न कर्तव्यस्त्वरितं चानुमानय॥६॥

त्रिजटेला भेटीस आणण्याची श्रीरामाची बिभीषणाला अनुज्ञा : कोप सांडोनि तत्वतां। आज्ञा पावें लंकानाथा। विलंब न करावा सर्वथा। उदासता न करावी॥३०॥ आपण जावें लंकेसीं। आनंदवावें सर्वांसीं। त्रिजटा सखी जानकीसीं। अत्यादरें तिसी पूजावें॥३१॥ जैसी माझ्या ठायीं प्रीती। त्रिजटा पूजावी त्याच स्थितीं। तिचेनि संगें सीता सती। तरली निश्चितीं दुर्गम॥३२॥ रावणाचा कडकडाट। तीव्र कामें दुर्धराट। त्याचें करावया सपाट। संगती निर्दुष्ट[6] त्रिजटेची॥३३॥ येईल तरी आणीं भेटीसी। परी प्रीती करावी बहु तिसीं। तेणें अति सुख आम्हांसी। मद्भक्तांसी पूजिलिया॥३४॥

वैदेह्याश्च सखी तत्र त्रिजटा नाम राक्षसी। अस्यास्तु प्रियहेतोस्त्वमनुज्ञां दातुमर्हसि॥७॥

जानकीच्या सुखाकारणें। अवश्य त्रिजटेसी पूजणें। मद्भक्त पूजिलें जेणें। तेणें अनंत गुणें मज पूजिलें॥३५॥

रामांसह अयोध्येत येण्याची बिभीषणाची त्यांना आग्रहाची विनंती: ऐकोनि श्रीरामवचन। लोटांगणीं बिभीषण। विनविता झाला आपण। रघुनंदन वंदूनी॥३६॥ आज्ञापिलें स्वामिनाथा। तें मज वंद्य निजमाथां। लंके न[7] वचें[7] सर्वथा। येईन भरताचे भेटीसीं॥३७॥ त्रिजटेची प्रीति गहन[8]। तरी क्षणही न लागतां जाण। येथें घेवोनि येईन। नमनालागून स्वामीच्या॥३८॥ श्रीराम सांडोनियां वनीं। विषयविलासभोगालागूनी। जो प्रवेश राजभुवनीं। श्यामवदनी तो पापी॥३९॥ दासाचा धर्म पूर्ण। निजस्वामी सुखसंपन्न। प्रवेशल्या राजभुवन। तेंचि आज्ञापन सेवका॥४०॥ यालागीं स्वामिनाथा। लंके न वचें सर्वथा। सवें येईन जी तत्वतां। बंधुभरता भेटीसी॥४१॥ झणीं अव्हेरू करिसी माझा। मी सवें येईन रघुराजा। निजभक्त कैवारी हा तुझा। निजपैजा बडिवार[9]॥४२॥ नुपेक्षिसी विज्ञापन[10]। म्हणोनि केलें प्रार्थन। मज सांडोनि जातां पूर्ण। प्राणोत्क्रमण होईल माझें॥४३॥

श्रीरामांनी ती विनंती मान्य केल्यामुळे बिभीषणाला परमानंद : ऐकोनियां तें वचन। प्रीतीं आलिंगिला बिभीषण। बाप कृपाळु रघुनंदन। अंतर पूर्ण जाणता॥४४॥ निजभक्ताचें मनोगत। संरक्षावें यथातथ्य। जाणता एक रघुनाथ। आणिका हें वृत्त कळेना॥४५॥ अंतर जाणता श्रीराम। जो कां भक्तकामकल्पद्रुम। भक्तलळे अति निःसीम। पाळावे नेम तयांचे॥४६॥ रामें

शब्दार्थ : १.अधिक, २. कष्टी, ३. निंदा, ४. वाईट, ५. स्त्रीपुरुषाला, ६. पवित्र, ७. जाणार नाही, ८. मोठी, ९. मोठेपणा, १०. अव्हेर करणारा नाहीस.

अति प्रीतीं आलिंगिला। तेणें बिभीषण सुखावला। ब्रह्मसुखा विटावूं लागला। ऐसा झाला आनंद॥४७॥ तेणें आनंदें नाचत। निजदेह न सांभाळित। रामरूपें सकळां नमित। हर्षयुक्त लोटांगणीं॥४८॥

त्रिजटेला रामदर्शनार्थ आणण्याची बिभीषणाची आपल्या दासांना आज्ञा : बोलावूनि निजगण। सांगता झाला बिभीषण। लंकेमाजि जावोनि आपण। घ्यावें दर्शन त्रिजटेचें॥४९॥ जिवलग सखी जानकीची। अनिवार प्रीति राघवाची। तेणेंचि तियेचे भेटीची। श्रीरामांसीं उत्कंठा॥५०॥ जे अनिमेष चिंतिती रामासी। राम चिंतित तयांसी। स्मरणाची महिमा ऐसी। देव भक्तासी ध्यातसे॥५१॥ देवासीं ध्यान भक्ताचें। काय वानूं भाग्य त्याचें। दर्शन घ्यावया त्रिजटेचें। मन रामाचें उत्कंठित॥५२॥ श्रीरामाचे प्रियकर। ते वंद्य आम्हां साचार। विमानीं घालोनि सत्वर। आणावी रघुवीरदर्शना॥५३॥ कुबेरापासोनि विमान। घेतलें रावणें हिरोन। तें घेवोनि यावें आपण। श्रीरघुनंदन आरोहणा॥५४॥ ऐसें आज्ञापितां दूतांसी। आज्ञेप्रमाणें लंकेसीं। जाऊन भेटले त्रिजटेसी। लोटांगणेंसीं अति प्रीतीं॥५५॥ माते त्रिजटे परिसें विनंती। बिभीषणें पाठविलें तुजप्रती। तुझे भेटीची श्रीरघुपती। आस्था[1] चित्तीं लागलीसे॥५६॥ जरी मानेल तुझिया मना। तरी आरूढ होवोनियां विमाना। भेटावया रघुनंदना। शीघ्रत्वें जाण चलावें॥५७॥

त्रिजटेने विमान नाकारून ती पायी चालत निघाली : ऐकोनियां आज्ञापन। त्रिजटा घाली लोटांगण। श्रीरामें केली आठवण। भाग्य गहन पैं माझें॥५८॥ आज्ञेप्रमाणें त्वरित। तेथें येईन डोई चालत। विमानाचें कार्य येथ। मज सर्वथा असेना॥५९॥ माझा गुरु सीता सती। विमाना नातळेचि[2] ते सर्वार्थीं। भेटावया रघुपती। गेली चालत निजचरणीं॥६०॥ जियें वर्जिलें फळ मूळ। मांस जिरालें सकळ। अशुद्ध[3] नाहीं अळुमाळ[4]। अस्थिचर्म केवळ एक झाले॥६१॥ ते भेटावया रघुपती। गेली चरणीं चालती। तिसीं न पाहेचि रघुपती। कठिणवृत्तीं दिव्य मागे॥६२॥ तेथें इतराची गति कायसी। जे राम भेटेल विषयविलासीं। ज्यासी विषयेच्छा मानसीं। श्रीराम त्यासी केंवी भेटे॥६३॥

संप्रदायाची महती : यालागीं मी आपण। सर्वथा नातळें विमान। गुरुसंप्रदायेंकरोन। श्रीरामचरण सेवीन॥६४॥ जो लाजे संप्रदायासी। अथवा कां विषयविलासी। तो केंवी पावे रामासी। जाय निजनरकासी निजकर्में॥६५॥ विषयांचिये संगतीं। नरका गेले नेणों किती। अद्यापि कायसी विषयस्थिती। निजांगें रघुपती सेवावा॥६६॥

रामदर्शनार्थ चाललेल्या त्रिजटेची भावावस्था: म्हणोनि उठली सुंदर। रामदर्शनीं आल्हादपर। चरणीं चालत वेगवत्तर। श्रीरामचंद्रनमनासी॥६७॥ सीता गेली ज्या रीतीं। आठवोनियां ते स्थिती। अति हळुवार लघुगती। पदगतीं संचार॥६८॥ अति साटोपें[5] देह चालतां। सर्वथा चळण नाहीं चित्ता। चित्त जडलें श्रीरघुनाथा। श्रीरामकांतानुग्रहें॥६९॥ अनुग्रहाचें बळ दारुण। सर्वत्र जो [6]अपरिच्छिन्न। रहितदेशकाळवर्तमान। चित्त निमग्न तेथें झालें॥७०॥ तेणें अनुसंधानें चालतां। धरा[7] न दिसे पाऊल ठेवितां। दृश्य नये दृष्टीचे हाता। शब्दीं निःशब्दता शब्दार्थे॥७१॥ निग्रहोनि[8] सर्वेंद्रियवृत्ती। श्रीराम धरोनियां चित्तीं। भेटावया रघुपती। आनंदभरित चालिली॥७२॥ अंतरींचिया निजवृत्तीं। त्रिजटा चालतां सहजस्थितीं। पुढें देखिला रघुपती। सीतासतीसमन्वेत॥७३॥

सीता-रामांच्या दर्शनामुळे त्रिजटेला अपार आनंदाचे भरते : जेंवी सागरीं लहरी। क्रीडे त्याची त्यावरी। श्रीरामें सीता सुंदरी। तैसियापरी शोभत॥७४॥ सूर्याचे ठायीं जैसी दीप्ती। कीं

शब्दार्थ : १. हुरहुर, २. न स्पर्शे, ३. रक्त, ४. किंचित, ५. दक्षतेने, ६. परिपूर्ण, ७. पृथ्वी, ८. ताब्यात ठेवून.

कर्पूराचे ठायीं दृती[1]। कनकाच्या ठायीं कांती। श्रीरामीं शोभती तेंवी सीता॥७५॥ रामरूपीं जगज्जननी। देखोनियां जनकनंदिनी। हरिखली राक्षसभगिनी। लोटांगण घालित॥७६॥ चुकलिया बाळका माता। भेटलिया आनंद चित्ता। तेंवी देखोनि जनकदुहिता। त्रिजटेच्या चित्ता अति हरिख॥७७॥ मूकिया जोडे वाक्यसिद्धी। कीं निर्दैवा लाभे महानिधी[2]। पुरश्चरणें मंत्रसिद्धी। जेंवी समाधि योगिया॥७८॥ जिज्ञासुया ब्रह्मज्ञान। तेंवी जानकीरघुनंदन। देखोनियां त्रिजटा पूर्ण। आनंदमग्न पैं झाली॥७९॥ ते देखोनि श्रीरामासी। अति अवस्था झाली कैसी। देखोनियां निजवत्सासी। धांवे प्रीतीसीं माउली॥८०॥ चुकलिया बाळका माता। भेटलिया आलिंगी तत्वतां। तैसे झालें श्रीरघुनाथा। सप्रेमता आलिंगी॥८१॥ आलिंगितां रघुनंदन। त्रिजटा आनंदमग्न। सागरीं मिळे जेंवी लवण। तैशी दशा पूर्ण पैं झाली॥८२॥ अलंकार हारपे सुवर्णीं। तेंवी त्रिजटा रघुनंदनी। स्वयें गेली पैं बुडोनी। सर्वथा जनीं अलक्ष॥८३॥ आलिंगनाचे मिषें[3] पूर्ण। स्वरूपीं समावेश करून। हळुच सोडिली आलिंगून। त्रिजटा आपण श्रीरामें॥८४॥ नसोनियां दोनीपण। प्रतिबिंब भासे पूर्ण। तेंवी सुटलें आलिंगन। दोनीपण नुरवोनी॥८५॥ चरणीं ठेवोनि मस्तक। उथळलें निजसुख। तेणें करोनि रघुकुळटिळक। त्रिजटा देख प्रार्थित॥८६॥

श्रीरामांना त्रिजटेची विनम्र विज्ञापना: श्रीरामस्वामी सावधान। परिसावें माझे विज्ञापन। तुझे संगतीहूनि जाण। संगति गहन[4] दासांची॥८७॥ तुझ्या आलिंगनीं देख। देसी जें निजात्मसुख। तें देणें अलोलिक। वचनमात्रें निजभक्तीं॥८८॥ वेदशास्त्रां नेणवसी। साधकासी नातुडसी। तो केंवी येरां आतुडसी। दर्शनासी धांडोळितां॥८९॥ तीर्थोतीर्थीं फिरों जातां। सर्वथा न लभे तुझी वार्ता। अधोमुखें धूम्र घेतां। तूं सर्वथा नातुडसी॥९०॥

सत्संगमहिमा : पात करितां पर्वतीं। देह देतां कर्वतीं। सर्वथा नव्हे तुझी प्राप्ती। सत्संगतीवांचूनी॥९१॥ उग्र तपीं जो नातुडसी[5]। तो श्रवणकीर्तनापासीं। सत्संगतीसीं पैं तिष्ठसी। अहर्निशीं श्रीरामा॥९२॥ सत्संगतीं कथाश्रवण। सद्भावें करितां संपूर्ण। साकल्यें सांपडसी पूर्ण। श्रवणें जाण अनायासें॥९३॥ अथवा कां हरिकीर्तन। विलज्ज करितां जाण। नामें ओसरला येसी आपण। वत्सालागून धेनु जैसी॥९४॥ सत्संगें नामकीर्तन। नि:शंक करितां संपूर्ण। न पाचारितां येसी धांवोन। समाधान कीर्तनीं॥९५॥ भक्त विरक्त जरी चित्तीं। तरी ओळंगती चारी मुक्ती। जरी भक्त न धरी हातीं। दाटोनि निघती घर त्याचें॥९६। मुक्ती होवोनि अंकिता। नित्य ओळंगती तुझिया भक्ता। कृपेनें हात ठेविता माथां। स्वयें रघुनाथा भेटसी॥९७॥ विषमबुद्धी तुजपासीं। सर्वस्वें भजती अहर्निशीं। त्यांसीच तूं प्रसन्न होसी। बुद्धि ऐसी लाचुगी[6]॥९८॥ परी अभक्ताच्या घरासी। विसरोनियांही न वचसी। तैसें नाहीं तुझ्या भक्तासी। नाहीं मानसीं अरिमित्र॥९९॥ निजहितीं चाड ज्यांसी। तिहीं सांडोनि इतर संगासी। दृढ धरितां सत्संगासी। निजसुखासी पाविजे॥१००॥

त्रिजटेने वर्णिलेला अनुभव: नव्हती आणिकांच्या कथा। माझा अनुभव प्रत्यक्ष आतां। भेटलिया जनकदुहिता। श्रीराम तत्वता भेटला॥१॥ कर्म विचारितां राक्षसी। मनुष्याचा आहार आम्हांसी। भेटी होतां जानकीसी। निजकर्मासी विसरलें॥२॥ सत्संगें स्मरतां नाम। नामें झालें नित्य निष्काम। प्रत्यक्ष भेटला श्रीराम। विश्रामधाम[7] जगाचें॥३॥ दुष्टकर्मी हाडखायेर। त्यासी भेटला रघुवीर। हा सत्संगाचा बडिवार। वदावया वक्त्र सरेना॥४॥

संताची लक्षणे व गुरुदास्याचे महत्त्व : कोण तो संत म्हणसी। जेणें भेट होय श्रीरामासी। ऐक त्याच्या चिन्हांसी। यथामतीसीं सांगेन॥५॥ स्वस्वरूपीं अवधान। करी तो मुख्य साधु

शब्दार्थ : १. सुवास, २. मोठे ठेवणे, ३. निमित्ताने, ४. श्रेष्ठ, ५. अप्राप्य, ६. लांच घेणारी, ७. विश्रांतीचे स्थळ.

पूर्ण। त्या सद्‌गुरूपरता जाण। साधु आन असेना ॥६॥ मुख्य साधुत्व सद्‌गुरुसी। स्वयें सेवितां तयासी। लात देवोनि संसारासी। ब्रह्मत्व अंगासीं स्वयें घडे॥७॥ सकळ साधनां श्रेष्ठ पूर्ण मुख्यत्वें गुरुसेवन। गुरुदास्यापरतें जाण। साधन आन असेना ॥८॥ निष्काम पुण्याचिये जोडी। केल्या होती जन्मकोडी। तैं लाहिजें रोकडी। निजावडी गुरुचरणीं ॥९॥ नाना साधनीं बहुत। कदा काळें नव्हे प्राप्त। तो गुरुदास्यास्तव येथ। होय प्राप्त निजात्मा ॥१०॥ तीर्थातीर्थाचिया प्रदक्षिणा। क्षम नुपजे ज्ञानध्याना। तेणें गुरुवचनासाठीं जाणा। आत्मदर्शन लाहिजें ॥११॥ योगयागादि नाना व्रतें। स्वतां सामर्थ्य नाहीं त्यातें। देखिलिया सद्‌गुरुतें। मुरड़तीं समस्तें लाजोनी ॥१२॥ याकारणें भलतेणें। उठावया संसारधरणें[1]। दृढ गुरुदास्य करणें। येर साधणें काज नाहीं ॥१३॥ मुखीं सद्‌गुरुनामस्मरण। मनीं गुरुमूर्तीचें ध्यान। श्रवणीं गुरुचरित्रश्रवण। करी पूजन पादसेवा ॥१४॥ पायीं नित्य प्रदक्षिण। अथवा कां दर्शनागमन। बुद्धीचा निश्चयो पूर्ण। आज्ञा प्रमाण संप्रदायें ॥१५॥

**प्रेमातिशयाने त्रिजटा मूर्च्छित:** ऐसें सांगतांसांगतां। पूर्ण भरतें दाटलें चित्ता। न सांभाळे प्रेमावस्था। पडली तत्वतां मूर्च्छित ॥१६॥ तें देखोनियां समग्र। अवघीं केला जयजयकार। गुरुमाहात्म्यचरित्र। अति पवित्र महामहिमा ॥१७॥ साचार श्रीरामाची प्राप्ती। गुरुवचनीं असे तिष्ठती। येवढी गुरुदास्याची स्थिती। त्रिजटा ख्याती अनुवादली ॥१८॥ सौमित्रादि बिभीषण। सुग्रीव आणि हनुमान जाण। मूर्च्छित सकळ वानरगण। चरित्र पावन ऐकोनी ॥१९॥ तें देखतांचि राघवा। आकळिलें अति कणवा[2]। विसरला निजस्वभावा। उठाउठीं खेंवा मिठी घाली ॥१२०॥ प्रयासीं सुटलें आलिंगन। परी दोघांही नाहीं दोनी पण। बाप कृपाळु रघुनंदन। आनंदला पूर्ण भक्तकीर्ती ॥२१॥ आपुलें प्रतिबिंब पूर्ण। ते हे साधु सज्जन। ऐसें जाणोनि आपण। त्रिजटा देखोन सुखावे ॥२२॥ लोटांगण घालोनि सकळांसी। त्रिजटा बोले अति प्रीतीसीं। भावें भजतां सज्जनांसी। भेट अनायासीं श्रीरामाची ॥२३॥

**संतनिंदेचे दुष्परिणाम:** हेळणा[3] कां द्वेषण। सज्जनांचें करितां संपूर्ण। उभयलोकीं निंद्य जाण। नरक दारुण तयासीं ॥२४॥ इहलोकीं जननिंद्य। पुढें दारुण नरकबाध। वार्ता नव्हे अर्थवाद। प्रत्यक्ष संबंध घडलासे ॥२५॥ माझी भगिनी शूर्पणखा। विरोधतां रामनायिका। स्वयें मुकली काना नाका। निंद्य लौकिका पैं झाली ॥२६॥ म्यां सेविली सीता सती। तेणें मज श्रीरामप्राप्ती। विरोधतां जानकीपती। नरकप्राप्ती शूर्पणखे ॥२७॥ इहलोक ना परलोक। स्वयें निंदिती नीच लोक। ऐसी दशा अलौकिक। विरोधितां देख सज्जन। ॥२८॥ त्रिजटा निजप्रतीती[4]। अनुवादतां अति प्रीतीं। आनंदली त्रिजगती। सुर वर्षती सुमनभार ॥२९॥

**सीता, बिभीषण आणि प्रमुख वानरांना त्रिजटेचे लोटांगण:** जानकीसीं लोटांगण। घालूनि दिधलें आलिंगन। तैसाचि सौमित्र जाण। प्रेमेंकरोन आलिंगिला ॥१३०॥ देखोनियां बिभीषण। हरिखें घाली लोटांगण। तुझेनि धर्मेकरोनि जाण। वंशोद्धरण श्रीरामें ॥३१॥ शरण जाऊनि श्रीरामासी। उद्धारिलें सकळ कुळासी। कीर्ति पावन सकळ जगासीं। हाडखाड़ासीं रामभजन ॥३२॥ सुग्रीव अंगद जांबवंत। जुत्पती मिनले[5] समस्त। येरी अत्यादरें तेथ। नमन करीत सर्वांसी ॥३३॥

**मारुतीला वंदन व त्याची प्रशंसा :** पुढे देखोनि मारुती। आनंद उथळला चित्तीं। लोटांगण अति प्रीतीं। मिठी घालिती हनुमंता ॥३४॥ तुझें नाम मारुती। तूं प्राण सकळांचा निश्चितीं।

---

**शब्दार्थ :** १. संसारबंधन, २. कृपेने, ३. निंदा, ४. स्वानुभव, ५. जमले.

तुझेनि सकळां स्थितिगती। चाळक श्रीरघुपतीचा होसी ॥३५॥ प्राणें प्राण्या निजगती। प्राणें प्राण्यां नित्यविश्रांतीं। प्राणें प्राण्या जीवनस्थिती। प्राणी वर्तती निजप्राणे ॥३६॥ असो आणिकांची स्थिती। जानकीचा प्राण तूं निश्चितीं। घेवोनि येऊनि श्रीरघुपती। लंकापती निवटिला ॥३७॥ सोडविल्या सुरपंक्ती। बिभीषणा राज्यप्राप्ती। भेटवोनि सीते रघुपती। राक्षसपंक्ती उद्धरिली ॥३८॥ नमन करितां सीता सती। न पाहेचि रघुपती। सुग्रीवादि सकळ जुत्पती। करितां विनंती पाहेना ॥३९॥ बिभीषण आणि सौमित्र। सकळ सुरवरांचा भार[1]। विनवितां अति तत्पर। चरित्र पावन त्रिलोकीं ॥१४०॥ ते काळीं तुवां आपण। प्रबोधोनि रघुनंदन। ख्याती केली दारुण। पावन चरित्र त्रिलोकीं ॥४१॥ दिव्या उतरोनि सीतेसी। प्रसन्न केलें स्वामीसीं। अति प्रीतीं ऐक्यतेसी। प्रकृति पुरुषासी भेटविली ॥४२॥ तुझिया उपकराचे स्वामी। अवघे जाण ऋणी आम्ही। ते प्रकृति सरती[2] श्रीरामीं। तुझ्या धर्मी पैं झाली ॥४३॥ प्रकृति पुरुषां एकात्मता। तुझ्या हातीं गा हनुमंता। देहो श्रीरामीं सरता। होय तत्वतां तुझेनि ॥४४॥

मारुतीकडून त्रिजटेला वंदन व परस्परांचे रामगुणसंकीर्तन : ऐसें करितां विनवण। हनुमान घाली लोटांगण। प्राणांचा चाळक रघुनंदन। सकळ पावन त्याचेनि ॥४५॥ बहुत बोलोनि कार्य कोण। सकळीं स्मरावा रघुनंदन। तेणें त्रैलोक्य पावन। सकळोद्धारण श्रीरामें ॥४६॥ ऐसें श्रीराममहिमान। परस्परें भक्तजन। करिते झाले वर्णन। श्रीरामध्यानसंनिष्ठ ॥४७॥ ऐकतां निजभक्तकथा। परमानंद श्रीरघुनाथा। विस्मित होवोनि तत्वता। भक्तचरित्रा पहातसे ॥४८॥

पुष्पक विनानातून अयोध्येस जाण्याची रामांना बिभीषणाची विनंती: तंव शरणागत बिभीषण। घेवोनि कामग विमान। लोटांगणीं रघुनंदन। प्रीतीकरून विनविला ॥४९॥ कुबेरापासोनि विमान। रावणें हरितलें आपण। तें निवेदोनि बिभीषण। करी विनवण श्रीरामा ॥१५०॥ जानकीसहित आपण। सवें सुमित्रानंदन। येथें करावें आरोहण। करावया गमन अयोध्ये ॥५१॥ अति रमणीय कामग। संकल्पमात्रें सवेग। अपेक्षित स्थळ अव्यंग[3]। न लागतां निमेष पाविजे ॥५२॥ ज्वाळमाळाकिंकिणीं[4]। सुवर्णमयरत्नाभरणी। पाचपेरोजांची मांडणी। तेजें दिनमणी[5] आच्छादी ॥५३॥ पताका झळकती अंबरीं। मुक्तघोषांचिया[6] हारी। हिरे माणिकें विचित्रपरी। अतिकुसरीं[7] खेवणिलीं[8] ॥५४॥ ऐसें अति मंडित विमान। पुढें ठेवोनि बिभीषण। करोनि चरणांसी नमन। कर जोडून राहिला ॥५५॥ तें देखोनियां रघुपती। संतोषला निजचित्तीं। अति मंजुळ मधुरवृत्तीं। बिभीषणाप्रती अनुवादे ॥५६॥

परवस्तूच्या उपभोगास रामांचा नकार: जितुकें रावणाचें वैभव। तुज दिधलें म्यां सर्व। तुवां बैसोनियां स्वयमेव। सुखगौरव भोगावें ॥५७॥ जेव्हां निवटिला दशाननी। तेव्हांचि तुझी राजधानी। ऐसें सर्वथा जन मानी। पर भोग पतनीं घालिती ॥५८॥ परमभुक्त जो विषये। सर्वथा नातळती योगिये। कदाचित इच्छा जाये। तैं व्यभिचार पाहें पैं केला ॥५९॥ बिभीषण झणें भाविसी चित्तीं। ज्यांसी नातळे रघुपति। ते आपणासीं भोग्य न होती। ऐसें सर्वार्थीं न म्हणावें ॥१६०॥ लंकेचें राज्य समस्त। तुम्हां भोग्य परंपरागत। म्हणोनि अधिकार येथ। भोगीं साद्यंत असे तुम्हां ॥६१॥ ऐसें बोलतां रघुनंदन। तटस्थ झाला बिभीषण। एका जनार्दना शरण। रामायण अति रम्य ॥१६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां त्रिजटादर्शनं नाम एकसप्ततितमोऽध्याय: ॥७१॥ ओंव्या ॥१६२॥ श्लोक ॥७॥ एवं ॥१६९॥

शब्दार्थ : १. समाज, २. मान्य, ३. न्यूनतारहित, ४. तेजस्वी घागऱ्या, ५. सूर्य; ६. मोत्यांच्या घोंसांच्या, ७. अति कौशल्याने, ८. जडली.

# अध्याय बाहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## लक्ष्मण - सीतेचे समाधान

त्रिगुणांची जटा शिरीं। सर्वथा नुगवे सुरासुरीं। स्वयें त्याची केली बोहरी। भजनेंकरी रामाच्या॥१॥ लागोनियां भजनवाटा। सोडिला त्रिगुणांचा कुरुठा[1]। नांवें साचार त्रिजटा। भजननिष्ठा उगवली॥२॥ ऐसी त्रिजटेची ख्याती। चरित्र पावन त्रिजगतीं। बिभीषणें करोनि विनंती। विमान रघुपती अर्पिलें॥३॥ तें न घेच रघुनाथ। तेणें बिभीषण सचिंत। विमाना न शिवे रघुनाथ। भाग्यहत मी करंटा॥४॥ विमानेंकरोनि तत्वतां। कांहीं सेवा रघुनाथा। माझी पावेल अल्पता। सकळ वृथा तें झालें॥५॥

बाह्य उपचारांनी राम वश होणे नाही: तरीं ऐसें केंवी घडे। जे बाह्य पदार्थी सेवा जोडे। बाह्य सर्वथा रामा नावडे। वृथा वेडे शिणताती॥६॥ ऐसा निश्चिय मानोनि चित्तीं। मौनें नमिला रघुपती। तंव झाली नवलगती। आला निश्चितीं विश्वकर्मा॥७॥

श्रीरामांसाठीं विश्वकर्म्याने नवे कामग विमान तयार करून दिले : घालोनियां लोटांगण। विनविला रघुनंदन। करावया अयोध्यागमन। नवें विमान करीन मी॥८॥ विश्वकर्मा अति निगुतीं। रचिता झाला विमानस्थिती। आजन्म कष्टांची विश्रांती। श्रीरघुपती सेविलिया॥९॥ येणें संतोषेंकरोनि जाण। निर्मिता झाला विमान। संकल्पमात्रें करी गमन। म्हणोनि अभिमान कामग॥१०॥

विमानाची पर्वताकार विशालता : अति प्रचंड पर्वताकार। रचिलें अति मनोहर। तेथील खणांचा विचार। संक्षेपाकार[2] सांगेन॥११॥ कोणी म्हणती एक खण। कोणी भाविती त्रिखण। कोणी भाविती पंचखण। कोणी दशखण भाविती॥१२॥ एक भाविती षोडश। एक सांगती एकवीस। एक सांगती पंचवीस। स्वमतें असोस[3] बोलती॥१३॥ निश्चय पाहतां संपूर्ण। एकीं अनेक भाविती खण। एक अनेक हे वणवण। नाहीं जाण दुखण्यासी॥१४॥ अट्ठावीस छत्तीस म्हणती। ते जाणावी अवघी भ्रांती। एकीं अनेकांची स्थिती। स्वमतें बोलती बहुविध॥१५॥ तळींहून चढती खण। शेवटिल्या खणा जातां पूर्ण। हरपे खणांची खणखण। ऐसें विंदान[4] साधिलें॥१६॥ सात पौळी अति सुटंका[5]। दहा गवाक्षें[6] पैं देखा। पंचप्रकारीं रचिलें चोखा। गाडोरा सुरेख त्रिगुणांचा॥१७॥ किंकिणींज्वाळमाळांचे परी। पन्नास आगळ्या दोनी वरी। तयांमाजी मुख्य चारी। निरंतरीं वाजत॥१८॥ इतर माळांचिया हारी। शोभताती नानापरी। गुंफिलिया त्रिप्रकारीं। नादाची परी अलोलिक॥१९॥ जे जे काळीं प्रीत जैसी। ध्वनि उमटे तैसी तैसी। दहा चाळक मुख्य त्यासी। इतर नादांसी नाहीं संख्या॥२०॥ नित्य प्रकाशालागूनी। दीपशिखा[7] पैं धरोनी। शशिसूर्य अनुदिनीं। दिवारजनीं[8] तिष्ठत॥२१॥ नवलक्ष दीपावळी। नित्य शोभती अंतराळीं। औटकोटी भूमंडळीं। पताकाओळी मंडित॥२२॥ मध्यखणीं हुताशन। नित्य करितसे पाचन। क्रियाशक्तिसंपादन। पाकशासन करीतसे॥२३॥ अरुचि उपजेल भोजनीं। म्हणोनि वैद्यराज दोनी। अश्विनीदेव अनुदिनीं। ओषधि घेवोनि वोळंगती[9]॥२४॥ भक्तिज्ञान वैराग्य चौखट। अति सुरस त्रिकूट। यथाकाळें एकनिष्ठ। अति निर्दुष्ट पुरविती॥२५॥ दशधा वायूचे पदर। तेचि दशादिशा अलंकार। जावों न देती सैर। मर्यादापर वागविती॥२६॥ चाळक तयासीं मारुती। संकल्पमात्रें गमनस्थिती। नित्य वर्तवी

शब्दार्थ : १. आश्रय, २. थोडक्यात, ३. यथेच्छ, ४. युक्ती, ५. फार सुंदर, ६. खिडक्या, ७. दीपज्वाळा, ८. दिवसा आणि रात्री, ९. सेवेला तत्पर असतात.

मनोवृत्ती। श्रीरघुपतिनिजमतें ।।२७।। आज्ञाशासन निरंतर। कर्ता स्वामी सौमित्र। त्याचेनि अनुमतें साचार। गगनसंचार विमाना ।।८२।। अति जिवलग पूर्ण। शुद्धभावार्थी बिभीषण। वागवावया विमान। आज्ञापन त्यासी केलें ।।२९।। बिभीषणासीं सखा जाण। सुष्ठबुद्धि सुग्रीव पूर्ण। विवेक वैराग्य समान। निजसमान वागविती ।।३०।। ऐसी निजकळा नागर[1]। धात्यानें[2] रचिलें विचित्र। जेथें साक्षी श्रीरामचंद्र। असे अगोचर होउनी ।।३१।। ऐसें साधोनि विंदान। विश्वकर्मा आपण। पुढें ठेवोनि विमान। रघुनंदन नमियेला ।।३२।।

लंकेमध्ये श्रीरामांची पूजा घडणार नाही म्हणून बिभीषणाच्या मातेला अतीव दुःखः येरीकडे लंकाभुवनीं। बिभीषणाची जननी। श्रीरामगमन ऐकोनी। झाली मनीं अति दुःखी ।।३३।। ऐसें होतें निजमानसीं। राम प्रवेशेल लंकेसीं। तेणें काळें अति प्रीतीसीं। यथा सामर्थ्येंसीं पूजीन ।।३४।। रूप पाहेन डोळेभरी। गोष्टी सांगेन तोंडभरी। वचन ऐकेन कानभरी। तैसेंच अंतरीं पैं ध्यान ।।३५।। अनंत जन्मांचें कल्मष पूर्ण। जें पुढेंही करीन दुराचरण। त्याचें करावया क्षाळण। श्रीरामागमन वांछित ।।३६।। श्रीरामभजनीं प्रीतीं गाढी। तेणें सर्वसंसारबेडी। तुटे न लागतां अर्धघडी। योनिसांकडी[3] पैं निरसे ।।३७।। याचि आशा उत्कंठित। श्रीरामाची वाट पाहत। तंव ऐकिलें विपरीत। राम गमनस्थ अयोध्ये ।।३८।। तरी आपलेंचि भाग्य हीन। उत्कंठा न होतां पूर्ण। आम्हांसि न देतां दर्शन। अयोध्यागमन मांडिलें ।।३९।। श्रीरामचरणीं नव्हेचि भेटी। वज्र पडो ये ललाटी। भाग्यें अतिशयें करंटी। फुंदे गोरटी अति दुःखी ।।४०।। करें पिटी ललाट। हृदयावरी हाणी चपेट। रामें उद्धरिला दशकंठ । उपेक्षा निष्टंक[4] आम्हांसी ।।४१।। चोरोनि आणिली निजभाज[5]। तो उद्धरिला राक्षसराज। आम्हां मोकलोनि रघुराज। केंवी प्रयाणवोज[6] करितसे ।।४२।। धन्य मंदोदरी पतिव्रता। निजांगेंचि तत्वतां। भेटोनियां श्रीरघुनाथा। संसारखता फाडिलें ।।४३।। श्रीरामतेजें आपण। पतीसवे सहगमन। करोनियां जन्ममरण। क्षणें जाण निरसिलें ।।४४।। करोनियां निजख्याती। सायुज्यिला रघुपती। तैसीच सुलोचना सती। निजमुक्ती साधिली ।।४५।। मंदभाग्य मी करंटी। निजांगेंचि उठाउठीं। श्रीरामाची निजभेटी। कडकडाटीं न घेचि ।।४६।। म्हणोनियां अति उद्विग्न। उकसाबुकसीं स्फुंदन। स्वयें करीतसे आपण। तेणें राम पूर्ण कळवळला ।।४७।।

कैकसीची तळमळ पाहून तिला भेटीसाठी आणण्यास श्रीरामांची आज्ञाः अंतर्यामीं श्रीरघुनाथ। तेणें जाणोनि अवचित। स्वयें बिभीषणा सांगत। तुमची माता येथें न येचि भेटी ।।४८।। तुम्हांसी स्मरण नाहीं निश्चित। आम्ही निजकार्यीं दुश्चित। मातेची भेटी न घेत। केवी निघत अयोध्ये ।।४९।। येरु मस्तक ठेवोनियां चरणां। स्वयें विनवी रघुनंदना। स्वामीचिया निजदर्शना। उत्कंठा मना मातेसीं ।।५०।। स्वामीनें स्मरण न करितां। केंवी आणूं न पुसतां। यालागीं रघुनाथा। नाहीं माता आणिली ।।५१।।

मातेला आणण्यासाठी बिभीषण दूतांना धाडतोः आज्ञेप्रमाणें आतां। घेऊन येईन निजमाता। म्हणोनि ठेवी चरणावरी माथा। धाडी सत्वरता दूतासी ।।५२।। आज्ञापिलें रघुनंदनीं। भेटों आणीं निजजननी। तुम्हीं सवेग जाऊनी। भेटीलागोनी आणावी ।।५३।। माझें सांगोनी लोटांगण। श्रीरामभेटीलागून। स्वयें आणावी आपण। अविलंबें करून जाण येथें ।।५४।। वंदोनियां तें वचन । लंकेमाजी येऊन। माते कैकसीलागून। केलें नमन सेवकीं ।।५५।। अयोध्येसीं प्रयाण करितां। तुझे भेटीलागीं यथार्थता। राहणें झालें रघुनाथा। मूळ[7] तत्वतां धाडिलें तुज ।।५६।।

---

शब्दार्थ : १. सुंदर, २, विश्वकर्म्यांने, ३. जन्ममरणदुःख, ४. संपूर्ण, ५. स्वपत्नी (सीता), ६. गमनप्रकार, ७. आमंत्रण.

**दूतांनी कैकसीला विमानातून येण्याचे विनविले कैकसी आनंदित :** अंगीकारोनी श्रीरामाज्ञा। वेगीं बैसोनि विमाना। शीघ्र करावें प्रयाणा। श्रीरामदर्शनालागूनी ॥५७॥ ऐकोनियां तो वचनार्थ। झाली पूर्ण आनंदभरित। पूर्वार्जित जे मनोरथ। ते समस्त आजि फळले ॥५८॥ श्रीरामदर्शना चित्त। होतें अत्यंत उत्कंठित। बाप कृपाळु रघुनाथ। अंतरवृत्त जाणता ॥५९॥ भेटावया रघुपती। न चले यानाची[1] निजगती। यानारूढ विषयस्थिती। सर्वथा रघुपती भेटेना ॥६०॥ भाग्य फळा आलें माझें। जें स्मरण केलें रघुराजें। चरणीं चालत निजवोजें[2]। भेटी जाइजे हेंचि भलें ॥६१॥ म्हणोनियां राजमाता। चरणीं चालली तत्वतां। भेटावया रघुनाथा। हर्षितचित्ता निघाली ॥६२॥ निघोनि नगराबाहेरी। आली रामसैन्याभीतरी। पुढें येवोनि झडकरी। धरिली करीं बिभीषणें ॥६३॥

**श्रीरामदर्शनाने कैकसीला अत्यंत प्रेमानंद होतो:** नेतां श्रीरामासंमुख। आनंदभरित रघुकुळटिळक। माता देखोनि एकाएक। आलिंगी देख निजप्रेमें ॥६४॥ आलिंगितां देख एकाएक। कैकसी सुखाची झाली देख। जन्म मृत्यु जरा अशेख[3]। स्वयें निःशेख विसरली ॥६५॥ विसरली ते पुत्रशोक। विसरली ते द्वंद्वदुःख। इहलोक परलोक। लोकालोक विसरली ॥६६॥ श्रीरामीं देतां आलिंगन। विसरली देहाचें भान। विरोनि गेली स्वयें आपण। जेंवी लवण जीवनीं ॥६७॥ श्रीराम भेटलिया तत्वतां। तुच्छ त्यापुढें समाधि अवस्था। सलोकता स्वरूपता। सायुज्यता सरेना ॥६८॥ ऐसें पडिलें आलिंगन। ते स्वरूपीं समावे संपूर्ण। युक्तीं सोडवून रघुनंदन। मनोहर आपण वचन बोले ॥६९॥

**रावणाचे दोष त्याच्या मातेला सांगून राम तिची समजूत घालतात :** रावण आणि कुंभकर्ण। तुझें पुनीत संतान। वधिता झाला रघुनंदन। ऐसें आपण न म्हणावें ॥७०॥ अभिलाषितां पतिव्रता। सकुळ रावणा क्षोभली सीता। तिणें करविलें त्याच्या घाता। बोल वृथा आम्हांसी ॥७१॥

**परनारीचा अभिलाष हेच सर्वनाशाचे आदिकारण:** जो अभिलाषी परनारी। पतिव्रता त्याहीवरी। त्यासी ठाव नेदी धरित्री। पचे[4] अघोरीं कल्पकोटी ॥७२॥ सीता जन्मली धरेभीतरीं। ते अभिलाषी कपटेंकरीं। म्हणोनि क्षोभली धरित्री। केली बोहरी कुळेंसीं ॥७३॥ परदारगामी नर। त्याचा भार अति दुर्धर। धरा साहों न शके अणुमात्र। जाय सत्वर रसातळा ॥७४॥ महापर्वत पाषाण। चतुर्विध सृष्टि संपूर्ण। त्याचा भार अणुप्रमाण। नाहीं जाण धरेसीं ॥७५॥ विषयी विषयलुब्ध देख। परदारगामी विशेख। पतिव्रते विक्षेपक[5]। भार देख धरेसीं ॥७६॥ तेणें अधर्मे दाटली। धरा अतिशयें क्षोभली। सकुळ समाप्ति केली। रावण धुळी मेळविला ॥७७॥

**रावण विश्वद्रोही होता, सीतारा ही निमित्तमात्र:** एका क्षोभली जनकबाळी। सर्वथा न घडे हेही बोली। विश्वद्रोहाची इंगळी। समूळ मूळीं पडिलासे ॥७८॥ ब्राह्मणांचे वृत्तिहरण। स्वधर्माचें विच्छेदन। बंदीं घातले सुरगण। विरोध पूर्ण त्रैलोक्या ॥७९॥ मुख्य ध्येय श्रीशंकर। ज्याचेनि सकळ दुस्तर। निरसोनि पाविजे परात्पर। जो सुखसार निजभक्ता ॥८०॥ त्याचे ठायीं उन्मादता। सेव्यासेव्य न विचारितां। भोगूं मागे स्वामीची कांता। गुरु तल्पगता[6] रावणा ॥८१॥

**रावणाने पार्वतीची अपेक्षा केल्यामुळेच तिने रावणाचे भस्म केले :** उमा क्षोभली अति क्रोधेंसीं। सकुळसैन्यपुत्रेंसीं। भस्म केलें रावणासी। बोल आम्हांसी न ठेवावा ॥८२॥ देवद्रोही ब्रह्मद्रोही।

शब्दार्थ : १. वाहनाची, २. मोठ्या आनंदाने, ३. संपूर्ण, ४. शिजे, ५. अडथळा करणारा, ६. गुरुपत्नीकडे कामदृष्टीने पाहणे.

विश्वाचा तो विश्वद्रोही। जगद्गुरु शंकराचा पाहीं। गुरुद्रोही रावण ॥८३॥ सकळ पापांहूनि विशेषतां। मुख्य पाप गुरुतल्पगता। सकुळ तेणें पावला घाता। जाण तत्वतां कैकसी ॥८४॥

बिभीषणाच्या पुण्याईची थोरवी राम वर्णितात: निजपापेंकरोनि पूर्ण। जावा अध:पाता रावण। शुद्ध धर्मात्मा बिभीषण। तेणें तो जाण उद्धरिला ॥८५॥ बंधूच्या सख्यत्वें पूर्ण। श्रीशंकरें कृपा करून। केला निष्पाप रावण। अपराधी पूर्ण जाणतांही ॥८६॥ रावणाची सगर्वता। कळों आली पैं समस्तां। क्रोधें हाणितल्या ज्यासीं लाता। तेणेंचि तत्वतां उद्धरिलें ॥८७॥ सावध ऐकें कैकसी। धन्य धन्य तुझी कुसी। बिभीषणातें प्रसविलीसी। सकळ कुळासीं उद्धरण ॥८८॥ रावणाच्या पापें त्वरित। नरका जावें कुळासहित। धन्य भाग्याचा हा हरिभक्त। सकळ कुळ निश्चित उद्धरिलें ॥८९॥ दोहींची स्थिती निश्चितीं। प्रत्यक्ष दिसे हातोहातीं। असत्पुत्रें नरकप्राप्ती। उद्धारगती सत्पुत्रें ॥९०॥ रावणाचेनि दुराचरणें। जग निंदी मातेकारणें। बिभीषणाचेनि साधुपणें। जनें वानणें तुजलागीं ॥९१॥

कुलं पवित्रं जननी कृतार्था वसुंधरा पुण्यवती च तेन ।
अपारसंवित्सुखसागरेस्मिन् लीनं परे ब्रह्मणि यस्य चेत: ॥१॥

कृतार्थ माता कोणती ? : हरिभक्त ब्रह्मसंपन्न। ज्याच्या कुळीं होय उत्पन्न। तेणें सकळ कुळ पावन। ब्रह्मसंपन्न पैं होत ॥९२॥ हरिभक्त जन्मे जिचे कुसीं[1]। अवघें त्रैलोक्य वंदी तिसी। तें प्रत्यक्ष घडलें कयाधूसीं[2]। झाली जगासी अतिवंद्य ॥९३॥ प्रल्हाद नुपजतांचि पूर्वी। नारद मानी[3] सर्वभावीं। बंदिमोचन इंद्रादि देवीं। प्रसूति भावी ऐकतां ॥९४॥ जेथें राहती भगवद्भक्त। तें भूमंडळ होय पुनीत। कीर्तनसुखें डुल्लत। जग उद्धरत ज्यांचेनि ॥९५॥

वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।
विलज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥२॥

भगवद्भक्ताची लक्षणे : ज्याचेनि भूमंडळ पावन। ऐक त्या भक्ताचें लक्षण। स्वयें बोलिला भगवान। जडउद्धरण ज्याचेनि ॥९६॥ आनंदें करिती हरिकीर्तन। नामें सर्व गर्जे गगन। श्रोतिया वक्तयाचें अंतरक्षाळण। न लागतां क्षण पैं होय ॥९७॥ क्षाळलेनि अंतरें। परमानंद अंतरीं भरे। चित्त चित्तपणा विसरे। न देखे दुसरें जगामाजी ॥९८॥ जगाचे ठायीं विषमता। चित्तपणें भासे चित्ता। तेणें श्रवण कीर्तन करितां। स्वयें भगवंता रातले ॥९९॥ तेणें अंतर सुखावे तत्वतां। त्रिषम जगामाजी पाहतां। बुडाली विषमाची वार्ता। चिदाभासता[4] सर्वत्र ॥१००॥ जेथें दुजेपणाचें भान। तेंचि लाजेसीं आयतन[5]। हारपलें द्वैतभान। लज्जा पूर्ण निमाली ॥१॥ उन्मत्ताचे परी जाण। निर्लज्ज करी कीर्तन। तेणें कीर्तनें सदा आपण। करी नर्तन तालच्छंदें ॥२॥

मद्यरसाने संसार विरण्यापेक्षा ब्रह्मरसाने देहातीत होणे केव्हाही चांगले: जो मोलें घेऊनि मद्यासी। स्वयें होय विषयविलासी। तो विसरे देहभावासी। द्वैत त्यासी भासेना ॥३॥ उन्मादरस विचित्र। मेळवूनी केलें एकत्र। त्याचा एवढा बडिवार। क्षणें संसार विसरवी ॥४॥ सकळ रसाचें रसपान। जे गोडियेमाजी होती निमग्न। तो ब्रह्मरस सेविलिया जाण। संसारभान केंवी उरे ॥५॥ ऐसे ब्रह्मरसमहायोगें। जगीं मद्भक्त दाटुगे। कळिकाळातें जिणोनि वेगें। नामबळें जग उद्धरती ॥६॥ एवढें भक्ताचें महिमान। तो तुझा पुत्र बिभीषण। भगवद्भजनें अति पावन। जग उद्धरणें याचेनि ॥७॥ हरिभक्तांची नाममाळा। प्रात:स्मरणीं स्मरतां अबळा। महापातकांचा पाळा[6]। एके हेळां[7] भस्म होत ॥८॥

---

शब्दार्थ : १. पोटी, २. प्रल्हादाचे मातेला, ३. पुढील, ४. चैतन्यस्थिती, ५. स्थान, ६. समूह, ७. त्याच वेळी.

बलिर्बिभीषणो भीष्म प्रह्लादो नारदो ध्रुवः। षडेते वैष्णवा ज्ञेयाः स्मरणं पापनाशनम् (॥३॥)

महाविष्णूचें वरद ऐसें। भक्तस्मरणें पाप नासे। तुझें भाग्य उत्कट कैसें। पुत्र बैसे भक्तओळी॥९॥ ऐसें मातेचें शांतवन। स्वयें करी रघुनंदन। येरी घालोनि लोटांगण। करी विनवण स्वामीचें॥११०॥ ऐकें स्वामी रघुनंदन। तुझ्या निजभजनें सकळ कल्याण। भजनास्तव कुसवा धन्य। धन्य संतान तुझेनि॥११॥ धन्य रावण कुंभकर्ण। तुवां निजहस्तें विंधोनि बाण। पुत्रां दिधलें सायुज्यसदन। भाग्य कोण त्याहूनी॥१२॥ एकल्या न देतां मुक्ती। उद्धरिली सकुळ संतती। अगाध रामभजनाची ख्याती। राक्षसां मुक्ति हटेंतटें[१]॥१३॥ विरोधें पावले मुक्तीसी। न कळे भजे त्या काय देसी। काय वानूं बिभीषणासी। म्हणोनि चरणांसी लागली॥१४॥ उठोनियां वेगेंसीं। श्रीरामें धरिली हृदयेंसीं। धन्य धन्य ते कैकसी। श्रीराम भजनासीं विनटली॥१५॥

कैकसी- रामभेट कथा क्रौंचरामायणातील आहे : श्रोते विषम मानिती पोटीं। मूळीं देखिली नाहीं दृष्टी। कैकसी श्रीरामाची भेटी। नवी गोष्टी हे कैंची॥१६॥ तरी ज्याचे पोटीं असेल आशंका। तेणें क्रौंचरामायण पहावें देखा। तेथील हा भाव निका। असेल ठाउका ज्ञात्यांसी॥१७॥ तरी शरण येतां रामासीं। माता तुष्टली बिभीषणासीं। श्रीरामीं प्रेमा कैकसीसीं। तेणें भेटीसीं सुचविलें॥१८॥ अनंत कथा रामायणी। शतकोटि वदली वाल्मीकाची वाणी। सकळ कथा आलोडोनी। कोणी शोध न करूं शके॥१९॥ माझें लोटांगण तत्वतां। कोप न मानावा श्रोतां। एका जनार्दनी वक्ता। तोचि वाक्यार्था चाळित॥१२०॥ असो आतां परिहारता[२]। सैराट[३] करी रामकथा। पावन करी श्रोतां वक्ता। नित्यमुक्तता श्रीरामें॥२१॥ यालागीं श्रोतेजन। आप्त इतर परिपूर्ण। त्यांसी माझें लोटांगण। क्षमा आपण करावी॥२२॥ श्रीरामें पावन श्रोता। श्रीरामें पावन वक्ता। श्रीरामकथा अनुमोदितां। उद्धरी तत्वतां श्रीराम॥२३॥ पुढील कथानुसंधान। सवडी पाहोनि पूर्ण। सांडूनि श्रीरामअंकासन। जनकनंदिनी ऊठली॥२४॥ होतां इतर संवादासीं। उठतां नयेचि जानकीसीं। उच्छृंखळता नाहीं तिसीं। मर्यादेशीं मंडन॥२५॥

रामांच्या अनुज्ञेने सीता लक्ष्मणाचे चरणवंदन करून त्यांची क्षमा मागते : भेटावया सौमित्रासीं। आज्ञा पुसोनि राघवासी। जवळी येवोनि वेगेंसीं। लागली चरणांसी अति प्रीतीं॥२६॥ क्षमा करावी निश्चित। मी तुझें निजअपत्य। नेणतां दोघांचें महत्त्व। वचन दुरुक्त बोललें॥२७॥ श्रीरामाचा जिवलग। त्यासीं छळितां सवेग। महापापिणी निजडाग[४]। मज सवेग लागला॥२८॥ महापाप तें अल्प। भक्तच्छळण तें वज्रपाप। निरय[५] भोगिजे आकल्प। नाहीं अल्प उद्धार॥२९॥ तेणें पापें त्वरित। मज धरोनियां लंकानाथ। वेगें नेलें लंकेआंत। श्रीरघुनाथ अंतरला॥१३०॥ नित्यछळण रावणाचें। राखण क्रूर राक्षसींचें। खाऊं गिळूं भाषण त्यांचें। दुर्ग लंकेचे सभोंवतें॥३१॥ सकृत्[६] छळितां लक्ष्मण। पूर्ण क्षोभला रघुनंदन। नित्य रावणाचें छळण। सोसलें पूर्ण षण्मास॥३२॥ श्रीराम भक्तांचा अंकित। श्रीराम भक्तांचा विक्रीत। भक्तां सबाह्य श्रीरघुनाथ। नित्य नांदत सर्वदा॥३३॥ म्हणोनियां यथार्थ। जेणें पूजिले रामभक्त। तेणें पूजिला रघुनाथ। उपचारयुक्त षोडश॥३४॥ घृतप्लुतअवदानीं। भक्त सुखावले भोजनीं। तेणें षड्रसें करोनी। केला रघुनंदनीं नैवेद्य॥३५॥ जेणें विरोधिले रामभक्त। तेणें विरोधिला रघुनाथ। अमूर्त होवोनियां मूर्त। क्षणें घात करी त्याचा॥३६॥ दुर्धर आयुधें अलोलिक। सुदर्शन गदादिक। अक्षयी भाते कोदंड देख। रघुकुळटिळक वागवी॥३७॥

शब्दार्थ : १. विरोधाने, २. शंकासमाधान, ३. विस्तृत, ४. कलंक, ५. नरक, ६. एकवार.

भक्तविरोधी दारुण जाणा। तोचि वैरी रघुनंदना। त्याच्या करावया हनना। करी प्रेरणा शस्त्रांची ॥३८॥ प्रल्हादासी विरोधितां। मरण पावला त्याचा पिता। भगवद्भक्तांचा द्वेष करितां। विघ्नघाता वरपडा[1] होय ॥३९॥ इतरांच्या कायशा गोष्टी! सौमित्र छळिलियासाठीं। राम लागोनि माझे पाठीं। क्षणें दिक्पटीं लाविलें ॥१४०॥ रामसेवेलागीं तत्वतां। वनवास घेतला माथां। ते नायकें श्रीरामकथा। ऐसी अवस्था मज झाली ॥४१॥ भक्तद्वेषी महापापिणी। अंतरलें रघुनंदनीं। तें उपसाहावें[2] म्हणोनी। लोटांगण घातलें ॥४२॥ सौमित्रचरणीं माथा। ठेवोनियां जनकदुहिता। उकसाबुकसीं स्फुंदतां। अति अवस्था पैं झाली ॥४३॥

लक्ष्मणाचे सीतेस वंदन व स्वत:चे दोषदिग्दर्शन: तें देखोनि सुमित्रानंदन। घालोनि सीतेसी लोटांगण। अश्रुपूर्ण झाले नयन। करी रुदन अट्टाहास्यें ॥४४॥ तुझेनि वियोगें तत्वतां। अति अवस्था रघुनाथा। अंगीकारोनि पिशाचता। होय हिंडता वनोवनीं ॥४५॥ एवढिया विघ्नासी कारण। मुख्य माझें अधैर्यपण। न साहवेचि एक वचन। महापापी पूर्ण मी एक ॥४६॥ सीता लाविली दिक्पटीं। राम पाडिला अति संकटीं। विवरद्वारा उठाउठीं। नेती जगजेठी बांधोनी ॥४७॥ दुर्दशा श्रीरघुपती। मारावया उभा करिती। दैवें पातला मारुती। राक्षसपंक्ती निवटिल्या ॥४८॥ संदिसें[3] तेथोनि निघतां बाहेरी। सवेंचि युद्धमहामारी। रावणेंसीं जुंझारी। शरधारीं वर्षती ॥४९॥ आणीक सांगों तें किती। शरबंधनीं रघुपती। विसंज्ञ पडिला क्षितीं। हेही ख्याती पैं माझी ॥१५०॥ रावणें केलें तुझें छळण। श्रीरामासी दृढ बंधन। इतुकियासी मूळ मी पापी पूर्ण। सत्य जाण जानकिये ॥५१॥ ऐसें परस्पर दोघें जण। येरयेरांचा गळा धरून। निजापराधीं[4] अति उद्विग्न[5]। करिती रुदन अट्टाहास्यें ॥५२॥ तंव आश्चर्य झालें तेथ। श्रीरामचरण अवचित। दृष्टि पडतां निश्चित। शोक समस्त निमाला ॥५३॥ घालोनियां लोटांगण। विनविता झाला लक्ष्मण। मानूं नको याचें दूषण। रघुनंदन लाघवी ॥५४॥

'मूळ प्रेरणा देणारे श्रीराम आहेत.' असे सांगून सीतेचे सांत्वन : पूर्ण त्याचें मनोगत। राक्षस प्रबळले बहुत। त्यांचा करावया घात। विंदान[6] येथ रचियेलें ॥५५॥ सर्वांतर्यामी श्रीरघुनाथ। सकळ लाघव त्याचें येथ। तेणें संचरोनि हृदयांत। उभयवृत्त संपादिलें ॥५६॥ तुझे छळणबुद्धीसीं कारण। मुख्य परमात्मा रघुनंदन। माझ्या अधैर्यासीं मूळ पूर्ण। तोचि जाण जानकिये ॥५७॥ शब्दें घाय वण नाहीं होत। शब्दें प्राण नाहीं जात। शब्दें नव्हे देहपात। हें मी जाणत सर्वदा ॥५८॥ तेणें म्यां आपण। तुज शब्दासाठीं जावें सोडून। हें माझें अधैर्य नव्हे जाण। केलें विंदाण श्रीरामें ॥५९॥ अति दुरात्मा रावण। केलें सकळांचें अवरोधन। त्यासीं वधावया जाण। करविलें छळण तुजकरवीं ॥१६०॥ श्रीरामशक्ती तत्वतां। ते तूं बोलसी छळणवार्ता। त्यासीं मूळ श्रीराम कर्ता। विषाद सर्वथा न मानावा ॥६१॥ म्हणोनि घातलें लोटांगण। वंदिले जानकीचे चरण। मजवरी कृपा करावी पूर्ण। विषाद आपण न मानवा ॥६२॥ ऐसी परस्परें विनवण। करिती येरयेरांची आपण। तेणें विस्मित बिभीषण। वानरगण विस्मित ॥६३॥ लाघव[7] करोनि अद्‌भुत। निजापराधें पायां पडत। आपण साक्षी होवोनि तेथ। चरित्र पाहत दोघांचें ॥६४॥

श्रीराममहिमा: स्मरतां श्रीरघुनाथ। महापातकी उद्धरत। यांचा अपराध किती तेथ। नित्यमुक्त श्रीरामें ॥६५॥ श्रीरामें पावन वक्ता। श्रीरामें पावन श्रोता। श्रीरामें पावन कथा। जगदुद्धारता श्रीरामें ॥६६॥ श्रीरामें पावन वदन। श्रीरामें पावन श्रवण। श्रीरामें कर पावन। करितां पूजन चराचर ॥६७॥ करितां श्रीरामाचें ध्यान। श्रीरामें पावन होय मन। श्रीरामें चित्त पावन। करितां चिंतन रामाचें ॥६८॥ सांडूनि प्रपंचआधी[7]। श्रीरामी निश्चयें धरितां

---

शब्दार्थ : १. वश, २. क्षमा करावी, ३. लगेच, ताबडतोब, ४. आपण अपराधी म्हणून, ५. फार दु:खी, ६. युक्ती, ७. प्रपंचाची काळजी.

बुद्धी। तेथें झाली विपरीत विधी। स्वयें समाधी होवोनि ठाके॥६९॥ तेथें अभिमानाचें चिन्ह। स्वयेंचि पालटे आपण। सांडोनियां देहाभिमान। स्वयें रघुनंदन होऊनि ठाके॥१७०॥ अगाध श्रीराममहिमान। मनचि होवोनि उन्मन। चित्त होय चैतन्यघन। बुद्धि ते जाण समाधी॥७१॥ अहं तेंचि आपण। होवोनि ठाके सोहं पूर्ण। एका जनार्दना शरण। लाघवी पूर्ण श्रीराम॥७२॥ पुढें अयोध्येचें गमन। श्रीरामाचें अभिषिंचन। सुरस कथा अति गहन। श्रोतीं अवधान मज द्यावें॥७३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सौमित्रिजानकीसमाधानं नाम द्विसप्ततितमोऽध्यायः॥७२॥ ओंव्या॥१७३॥ श्लोक॥३॥ एवं॥१७६॥

## अध्याय त्र्याहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### श्रीरामांचे पुष्पकविमानात आरोहण

**विमान पाहून श्रीरामांची प्रसन्नता :** पुढें ठेवोनि विमान। विश्वकर्मा आणि बिभीषण। लोटांगण घालोनि पूर्ण। संमुख रघुनंदना राहिले॥१॥ कर जोडोनियां देख। विमानेंसहित सेवक। पुढें देखतां रघुकुळटिळक। अनंत सुखा पावला॥२॥

**तत्पुष्पकं कामगमं विमानमुपस्थितं प्रेक्ष्य हि दिव्यरूपम् ।**
**रामः प्रहृष्टः सह लक्ष्मणेन पुरा यथा वृत्रवधे महेंद्र॥१॥**

**श्रीरामांची तेजस्विता :** दिव्य तेजांचिया कोटी। अनंतसूर्य कोट्यनुकोटी। पडतां श्रीरामाची दृष्टी। प्रकाश उठी विमाना॥३॥ दिव्यतेजें देदीप्यमान। लखलखीत अवघें गगन। देखतांचि रघुनंदन। सुखसंपन्न पैं झाला॥४॥ आच्छादोनि निजप्रकाशासी। विमानद्वारा तो प्रकाशी। स्वयें देखोनि तयासी। अति संतोषी होतसे॥५॥ बोलतां जयाचा प्रकाशमहिमा। वेद पावला उपरमा[1]। कोण वर्णी तयाची सीमा। निरूपमता रामाची॥६॥ देखता जयाचे प्रकाशासी। अनंत सूर्यांचिया राशी। बुडोनियां जाती निजतेजेंसीं। कोणे देशीं नाढळती॥७॥ जयातें देखतांचि दृष्टीं। सचंद्र नक्षत्रांचिया कोटी। करपोनि जाती उठाउठीं। तें वैखरीसाठीं केंवी वर्णवे॥८॥ जेथें परेसीं सौरस नसे। पश्यंती मध्यमा कोण पुसे। बापुडी वैखरी[2] ते कायसे। स्वरूपांश वर्णावया॥९॥ एवढा प्रकाशाचा उमाळा। स्वयें आच्छादोनि स्वलीळा। विमान देखतां सांवळा। संतोषला अति प्रीतीं॥१०॥

**श्रीराम कसे शोभले ? :** देखोनियां विमानस्थिती। सौमित्र आणि रघुपती। अत्यंत संतोषले चित्तीं। जेंवी सुरपति वृत्रजयें॥११॥ वधोनियां वृत्रासुर। मरुद्गणेंसीं[3] अमरेंद्र। विजयश्री मनोहर। अति सुंदर शोभत॥१२॥ तेंवी वधोनियां दशशिर। सहितवानरनिशाचर। अति सुंदर मनोहर। स्वयें रघुवीर शोभत॥१३॥ वानरीं निशाचरीं वहिला। श्रीराम सौमित्र परिवारला। पुढें बिभीषण देखिला। पाचारिला समीप॥१४॥ अति प्रीती करोनि जाणा। सुग्रीव आणि बिभीषणा। सांगता झाला रामराणा। वानरसेना पुढें लावीं॥१५॥

**अनुजानामि वः सर्वान्यथेष्टं गम्यतामिति। तेनैव सेतुना तीर्त्वा वानरा मकरालयम्॥२॥**
**सुग्रीवश्च मया सार्धं विमानेनागमिष्यति। समेतो युवराजेन तथा मुख्यैश्च वानरैः॥३॥**
**इत्युक्तास्ते महाकाया वानराः कामरूपिणः। प्रदक्षिणमवर्तंत प्रहृष्टाः सहलक्ष्मणम्॥४॥**
**सुग्रीवमंगदं चैव राजानं च बिभीषणम्। प्रणम्य च शिरोभिस्ते निर्गता हरियूथपाः॥५॥**

---

**शब्दार्थ :** १. मौन धरले, २. चौथी वाणी, ३. देवांसह

यथोत्साहं यथाप्रीत्या यथागतमरिंदम। करतालान्विमुंचंत: सिंहनादांश्च पुष्कालान् ॥६॥

सर्वांनाच विमानातून जाता येणार नाही म्हणून काय उपाय योजावा असा रामांचा वानरांनाच प्रश्न : लक्षोनियां वानरसैन्य। बोलता झाला रघुनंदन। दुर्जय करोनियां रण। वैरी रावण निवटिला ॥१६॥ युद्धीं बहुसाल कष्टलेती। केली राक्षसांची शांती। आतां पावावया विश्रांती। निजनगराप्रती चलावें ॥१७॥ सकळ वानरांचिया श्रेणी। बैसतां न येती विमानीं। बिभीषण करितो विनवणी। बैसा विमानीं म्हणवोनी ॥१८॥ ऐसियासी काय युक्ती। ते सांगावी मजप्रती। बिभीषणाची चित्तवृत्ती। संतोषस्थिती जेणें पावे ॥१९॥ ऐसें करोनि विवंचन। मज सांगावें आपण। ऐकतां श्रीरामाचें वचन। वानरगण तटस्थ ॥२०॥

'तुझ्या कृपेने सर्व काही साधेल' असे वानरांचे उत्तर ऐकून रामांना संतोष : ऐकें स्वामी रघूत्तमा। तूं विश्वाचा विश्वात्मा। मान देतोसी प्लवंगमां। स्वभक्तमहिमा वाढवूनी ॥२१॥ मर्कटां विमानें कायसीं। स्मरतां तुझिया नामासी। वानरां गति आकाशीं। वैकुंठासी आकळिती ॥२२॥ सैरा उडती गोळांगुळें। ते विमानीं कोंडले। ऐसें न म्हणावें राउळें[१]। रामबळें अनिवार ॥२३॥ ऐकोनियां वानरवचन। संतोषला रघुनंदन। एकलें बैसतां नये जाण। करी विवंचन आरूढावया ॥२४॥

विमानातून आपल्यासह फक्त दहा सेनापतींन यावे अशी रामांची सूचना : सुग्रीवराजा वानरनाथ। युवराजा अंगदासहित। सेनापती सवें अमात्य। संख्या नियत[२] पैं दहा ॥२५॥

दहा सेनापतींची नांवे, त्यांच्या शौर्याचे वर्णन: मुख्य नीळ सेनापती। प्रधान जांबवंत महामती। दुसरा प्रधान प्रखरयुक्ती। वीर निश्चितीं पैं नळ ॥२६॥ सुषेण वैद्यराज सुबुद्धी। जेणें वांचविली वानरमांदी। प्रधानांमाजि तीक्ष्णबुद्धी। दारुण युद्धीं महावीर ॥२७॥ उग्रकर्मा दधिमुख। संग्रामीं चपळ अति दक्ष। तैसाचि गंधमादन देख। अति आवश्यक रामाचा ॥२८॥ ज्याच्या देखोनि सुगंधासी। कुंभकर्णे निजांगासीं। मर्दिला अति प्रीतीसीं। केलें अस्थींसीं पैं चूर्ण ॥२९॥ अस्थिमांसत्वचेसहित। अशुद्ध तेंही सुवासित। पीठ करोनियां तेथ। अंगी मर्दित कुंभकर्ण ॥३०॥ तेथें कृपाळु श्रीरघुनाथ। लाघव करोनि अद्भुत। नि:शेष झालें जें अव्यक्त[३]। तें आणिलें निश्चित व्यक्तीसीं ॥३१॥ पृथ्वीनें उभारिले पार्थिव। आपें अशुद्धादि रस सर्व। तेजें रेतादिक भाव। दृष्टिगौरव नेत्रांसी ॥३२॥ वायूनें चेतविला प्राण। नभें अवकाश दिल्हा पूर्ण। हृदयाकाश सुप्रसन्न। रघुनंदननिजकृपा ॥३३॥ इंद्रियाधिष्ठाते देव। राक्षसधाकें स्वयमेव। पळाले होते पैं सर्व। तिहीं निजावयव अंगीकारिले ॥३४॥ ब्रह्मा विष्णु आणि शंकर। बुद्धि चित्त अहंकार। तेथें प्रवेशले सत्वर। श्रीरघुवीरनिजकृपा ॥३५॥ मृत्यू तेथें धांवोनी। आला गतायुष्य घेवोनी। नवल श्रीरामाची करणी। विस्मित मनीं सुरसिद्ध ॥३६॥ श्रीरामप्रभावेंकरून। स्वयें रचला गंधमादन। तोही स्वयें निघे आपण। आरूढोन विमाना ॥३७॥ नरवीर अति बळियाढा। संग्रामीं शूर निधडा। परसैन्य देखोनि पुढां। करी धडमुंडांकित धरणी ॥३८॥ तैसाचि तरळही जाण। निधडी जयाची आंगवण। गवय गवाक्ष दोघे जण। वीर दारुण अति योद्धे ॥३९॥ दशेंद्रियांचे अधिपती। जेंवी दहाही देव निश्चितीं। तैसे दहाही सेनापती। विमानस्थितीं चालावें ॥४०॥

बाकीच्या सर्व वानरांनी पायी निघावे ही आज्ञा वानरांना मान्य, त्यांच्याकडून रामांचा जयजयकार: वरकड वानरवीर पाहीं। सेतुबंधें लवलाहीं। पायवाटे चालावें तिहीं। ऐकतां सर्वही सुखमय ॥४१॥ माथा धरोनि आज्ञापन। लोटांगणीं रघुनंदन। नमूनियां सकळ जन। केलें गर्जन रामनामें ॥४२॥ अति प्रीतीचेनि पडिभरें[४]। हरिखें नाचती वानरें। सिंहनाद दीर्घस्वरें।

शब्दार्थ : १. रामचंद्राने, २. मोजकी, ३. अदृश्य, ४. आधिक्याने.

एक भुभु:कारें गर्जती ॥४३॥ परस्परें वाजविती टाळी। क्षेमांलिंगन प्रीतिकल्लोळीं। रावण वधोनि महाबळी। मेळविला धुळी श्रीरामें ॥४४॥ सोडवोनि जनकात्मजा। अयोध्येसीं रघुराजा। निघाला गजरें वोजा। वानरफौजा चालती ॥४५॥ सोडविली देवांची बांधवडी। तोडिली नवग्रहांची बेडी। सीता सोडविली तांतडीं। वानरकोडी नाचती ॥४६॥ होवोनियां आनंदभरित। येवोनि नमिला रघुनाथ। स्वामी बैसल्या विमानांत। होती गगनस्थ वानरें ॥४७॥

आरुरोह ततो रामो विमानमभिपूजयन्। अंकेनादाय वैदेहीं श्रियं नारायणो यथा ॥७॥

तथारुरोह तं राजा सुग्रीवः सह मंत्रिभिः। लक्ष्मणश्च महाबाहुर्युवराजोऽगदस्तथा ॥८॥

कैकसी, त्रिजटादि वडील मंडळींना वंदन व विमानपूजा करून रामांचे विमानात आरोहण: आदिकरोनि कैकसी। त्रिजटेसहित लंकानिवासी। आज्ञा पुसोनि सकळांसी। विमानापासीं राम आले ॥४८॥ विधियुक्त पूजोनि विमान। करोनि प्रदक्षिणा नमन। आरोहण करितां रघुनंदन। तेजें त्रिभुवन उजळलें ॥४९॥ विमानीं बैसतां रघुवीर। त्रैलोक्य आनंदनिर्भर। स्वर्गीं आनंदले सुरवर। सुमनसंभार वर्षले ॥५०॥

स्वर्गस्थ देवांनी व भूमंडलावरील वानरांनी मंगलगान सुरू केले : यक्षगणादि किन्नर। नभीं सिद्धांचा जयजयकार। ऋषी करिती मंत्रस्वर। नादें अंबर दुमदुमित ॥५१॥ सुमंगल वेदध्वनी। मंगल आदरिलें वानरगणीं। मंगल आरंभिलें ब्राह्मणीं। नामेंकरोनी गर्जत ॥५२॥ श्रीरामाचे मांडीवरी। शोभे जानकी सुंदरी। जेंवी गिरिजात्रिपुरारी। तैशापरी शोभत ॥५३॥ अनुपम शोभाशोभित। सत्यलोकीं लोकनाथ[1]। सावित्रीसहित शोभत। तेंवी रघुनाथजानकी ॥५४॥ जेंवी लक्ष्मी नारायणीं। शोभे वैकुंठभुवनीं। तेंवी सीता जनकनंदिनी। रघुनंदनीं शोभत ॥५५॥ श्रीराम सीता बाह्य जगीं। सीता रामाच्या अंगसंगीं। सृष्टी शोभत इहीं दोघीं। न दिसे जगीं तिसरें ॥५६॥ धनुर्धारीदीक्षागुरु। विमानीं बैसलासे सौमित्र। आनंदला वानरभार। जयजयकार कां केला ॥५७॥ आज्ञा देवोनि इतरांसी। सेनापती आणि प्रधानांसी। सुग्रीवासहित अंगदेसीं। श्रीराम आज्ञेसीं बैसले ॥५८॥

उवाच चैनं काकुत्स्थः प्रियं मे राक्षसेश्वर। स त्वमेव गुणी विद्वान्कार्यं निश्चित्य तत्ववित् ॥९॥

क्षिप्रमारोहतु भवान्सामात्यः सपुरोहितः। पुरे प्रतिनिधिं कृत्वा कर्तव्यमिति मे मतिः ॥१०॥

ततो बिभीषणो राजा विधाय नगरे विधिम्। आज्ञाप्य मातरं धीमान्संदिश्य च समुद्विजन् ॥११॥

श्रीरामकृत बिभीषणाचा गुणगौरव: अत्यंत जिवलग आप्त। विरक्त अनुरक्त भावार्थ। गुणी असोनि गुणातीत। श्रीरघुनाथनिजभजनें ॥५९॥ जीवनीं जन्में मुक्ताफळ। तें उपजतांचि आटे जळ। तथापि परीक्षक कुशळ। म्हणती अतिढाळ पाणी आहे ॥६०॥ तैसें श्रीरामभजन करितां। गुणविकारीं वर्ततां। बिभीषण भोगी गुणातीतता। श्रीरघुनाथाचे निजभजनें ॥६१॥ अति सात्विक बुद्धि करून। निष्कर्मे सेवितां रघुनंदन। यालागीं सत्वगुणीं संपन्न। स्वयें रघुनंदन पाचारी ॥६२॥ विरोधें हाणितां लाता। सर्वथा विषाद नाहीं चित्ता। अमर्याद शांति तत्वतां। विद्वान् या अर्था म्हणे राम ॥६३॥

माता, सरमा व त्रिजटा यांना सैन्यासह लंकेत पाठवून विमानात बसण्याची बिभीषणाला रामांची आज्ञा: तत्वज्ञानें संपन्ना। ऐक सत्वमूर्ति बिभीषणा। नगरस्थांची संभावना। करोनि विमाना बैसावें ॥६४॥ प्रतिनिधि करोनि नगरासीं। सवें देवोनि मातेसी। पाठवावें निजधामासी। निजगजरेंसीं अति प्रीतीं ॥६५॥ त्रिजटा आणि सरमेसीं। निरवावें[2] कैकसीसी। सुखी करावें तियेसी। सख्यत्वेंसीं त्रिजटेच्या ॥६६॥ त्या दोघींसीं अति प्रीतीं। कृपा करावी निश्चितीं। बहुडवावे[3] सेनापती। सैन्यसंपत्तीसमवेत ॥६७॥

---

शब्दार्थ : १. ब्रह्मदेव, २. स्वाधीन करावे, ३. मागे पाठवावे.

त्याप्रमाणे करून बिभीषण विमानात बसला : ऐकोनि रामाचें वचन। मातेसीं करोनि नमन। प्रतिनिधि करोनि आपण। निजनगरा जाण बोळविलें ॥६८॥ सर्वे देवोनि त्रिजटेसी। बोळविली कैकसी। आज्ञा पुसोनि सकळांसी। श्रीरामापासीं स्वयें आला ॥६९॥ रामआज्ञे-करून। चौघे प्रधान घेऊन। राजा बिभीषण आपण। स्वयें विमान आरूढला ॥७०॥

हनुमंताची स्तुती करून त्याला विमानात बसण्याची अनुज्ञा : श्रीराम म्हणे हनुमंता। संपादिली सकळ व्यवस्था। विमानारोहण करीं आतां। सकळ वृथा तुजविण ॥७१॥ जैसें प्राणेवीण शरीर। तेंवी तुजवीण आम्ही समग्र। तुवां बैसोनि सत्वर। गमनसंचार संपादीं ॥७२॥ आम्हां सकळांचा चाळक। सत्य साचार तूं एक। तुझेनि मंडित सकळिक। वेगीं पुष्पक[1] अंगीकारीं ॥७३॥ ऐकतां श्रीरामाज्ञापन। हनुमान घाली लोटांगण। वंदूनि श्रीरामचरण। केलें आरोहण विमानीं ॥७४॥

नंतर विश्वकर्म्याला आलिंगन व वरदान: विश्वकर्मा येवानि पुढें। श्रीराम नमिला वाडेंकोडें। अति प्रेमाचेनि सुरवाडें। पडिलें झांपडें नेत्रांसीं ॥७५॥ अर्धोन्मीलित झाली दृष्टी। बाष्प दाटलें पैं कंठीं। श्वास दाटला असे पोटीं। नये वाक्पुटीं पैं शब्द ॥७६॥ अति प्रेमें देखोनि त्यासी। कृपा उपजली राघवासीं। स्वयें उचलोनि वेगेंसीं। निजहृदयासीं आलिंगिलें ॥७७॥ कृपेनें आलिंगितां रघुपती। त्रिविध तापा झाली शांती। पावला परम विश्रांती। झाली निर्मुक्ति भवश्रमा ॥७८॥ प्रेम देखोनि अद्‌भुत । आणि विमानाचें कुशळित। तेणें भजनें रघुनाथ। स्वयें वदत वरदासी ॥७९॥ निजकर्में आचरतां व्युत्पत्ती। तुझी मलिन नव्हे वृत्ती। अकर्तात्मक बोधस्थिती। सुखसंस्फूर्ति स्वानंदें ॥८०॥ सकळ सृष्टीचें संपादन। करितां न बाधी अभिमान। सहजस्थिती समाधान। सच्चिदानंदघनस्वरूप ॥८१॥ कुलाल भांडें निपजवित। परी गगन न करी घटाकृत। तें जेंवी करणीरहित। तेंवी तूं अलिप्त निजकर्में ॥८२॥ ऐसें देतां आशीर्वचन। विश्वकर्मा सुखसंपन्न। छेदोनि त्रिपुटीचें भान। कर्मबंधन छेदिलें ॥८३॥ कर्मामाजी निष्कर्मता। सर्व कर्मीं श्रीरघुनाथा। स्वयें झाला देखता। स्वयें वर्ततां निजकर्मीं ॥८४॥ आज्ञा पुसोनि सकळासी। विमान न्यावया मोक्षपुरीसी। अति त्वरा राघवासी। करी सकळासी पैं वेग ॥८५॥

धर्मार्थ कुशलैर्वीरैरारूढं तद्यथाविधि। तेष्वारूढेषु सर्वेषु सुखासीनेषु भागशः ॥१२॥
राघवेणाभ्यनुज्ञातं विमानं दिवमुत्पतत्। खेचरेण विमानेन प्रदीप्तेन विराजता ॥१३॥

नामगजरात त्वरेने विमान अयोध्येला निघाले: सप्तपुरींमाझारीं। पहिली मोक्षाची अयोध्यापुरी। विमान न्यावया तेथवरी। कळवळा भारी श्रीराम ॥८६॥ सुंदर कामग विमान। संकल्पमात्रें करी गमन। पावावया मोक्षभुवन। अधिकारिया पूर्ण आज्ञापी ॥८७॥ श्रीरामाज्ञेंकरून। स्वधर्मनिष्ठा हरिगण[2]। स्वाधिकारेंकरोन। स्वस्थानीं पूर्ण बैसले ॥८८॥ श्रीरामाज्ञें स्वस्थ। स्वाधिकारें नेमस्त। निजासनीं बैसलें समस्त। श्रीरघुनाथ सुखमय ॥८९॥ श्रीराम बैसतां विमानीं। आनंद कोंदला त्रिभुवनीं। लागल्या वाजंत्रांच्या ध्वनी। विचित्र स्तवनी त्यांमाजी ॥९०॥ विचित्र नादांचा उपक्रम। ऐकतां मन पावे उपरम। सामगायन मनोरम। बहुत्साम रथंतर ॥९१॥ वानरांचा भुभःकार। रामनामाचा गजर। सुरवरांचा जयजयकार। नभीं खेचर गर्जती ॥९२॥ रामनामाचा गंभीर ध्वनी। गेला सत्यलोक भेदूनी। दिशांच्या पोकळी भरोनी। श्रीरामध्वनी कोंदला ॥९३॥ नाम भरतांचि गगनीं। वोसर[3] चालिला तेथोनी । वर्षो लागला अमृतकणीं। तेणें अवनी तिंबली[4] ॥९४॥

शब्दार्थ : १. पुष्पकनामक विमान, २. वानरगण, ३. वर्षाव, ४. भिजली.

रामनामसिंचनामुळे धरणी मृदू झाली : अमृतसिंचन धरेसीं। तेणें विसरली कठिनत्वासी। स्वयें मृदु झाली कैसी। नवनीतासी लाजवी॥९५॥ श्रीरामें सुखावली धरा। दुभों लागली ऋषीश्वरां। फळमूळधान्यद्वारा। सुखी द्विजवरां करीतसे॥९६॥ नामें भेदलें पाताळ। जाळित पन्नगांची गरळ। निर्विष झाले व्याळ[1]। नामबळ अनिवार॥९७॥ श्रीरामनामाचा गजर। करीत त्रैलोक्याचा उद्धार। स्वयें चालिला रघुवीर। निजनगरप्रवेशा॥९८॥ विमान उसळतां गगनीं। तळीं दिसे सकळ अवनी। तेणें संतोष रघुनंदनीं। सीतेलागूनी वृत्त सांगे॥९९॥

अब्रवीन्मैथिलीं सीतां रामश्चंद्रनिभाननाम्। कैलासशिखराकारे त्रिकूटशिखरे स्थिताम्॥१४॥
अवेहि लंकां वैदेहि निर्मितां विश्वकर्मणा। एतदायोधनं पश्य मांसशोणितकर्दमम्॥१५॥

आकाशातून विमान जाऊ लागल्यावर खाली दिसणाऱ्या घटनांची माहिती श्रीराम सीतेला सांगू लागले : चंद्रवदना गोरटी। अंकीं बैसवी जगजेठी। हातीं धरोनि हनुवटी। श्रीराम गोष्टी सांगत॥१००॥ सावध ऐकें सीतासुंदरी। तुजकारणें वानरीं। ख्याति केली त्रिकूटशिखरीं। महामारी राक्षसां॥१॥ अमरावतीसमान। रावणाचें लंकाभुवन। विश्वकर्म्यानें आपण। रचिलें अनेक कुसरीं[2] ॥२॥ क्षणमात्रें तिचें दहन। हनुमंतें केलेंसे आपण। तेचि सुवर्णमय ओतिली जाण। प्रताप पूर्ण हनुम्याचा॥३॥ तये लंकेचे चौबारां[3]। मारिल्या थोर थोर धुरा[4]। नद्या रुधिराच्या अपारा। कर्दम[5] थोर मांसाचा॥४॥ वीरां वानरां झोंटधरणी। रणनदी वाहविली रणीं। वानर दुधड घायेंकरोनी। पुच्छें कवळोनि मिसकळती॥५॥ मारिले रावण कुंभकर्ण। इंद्रजित अखयापुत्र दारुण। मारिले सेनानी प्रधान। सकळ सैन्य निर्दळिले॥६॥ तुझेनि कैवारें सुंदरी। रांडा झाल्या कोटिवरी। शंखस्फुरण घरोघरीं। शस्त्राधारीं झोडिले॥७॥ राज्य देवोनि बिभीषणासी। तुज सोडविले परियेसीं। इतकें सांगतां राघवासी। विमान वेगेंसीं चालिलें॥८॥

एषो हि दृश्यते देवि समुद्रः सरितां पतिः। पूर्वजो ज्ञातिरस्माकं येन सख्यं कृतं मया॥१६॥

सागराने सख्य करून सेतुबंधन कसे झाले ते सांगतात : पुढें देखोनि सागर। सांगता झाला रघुवीर। हा आमचा परम मित्र। कृतोपकार आम्हां याचा॥९॥ आमुच्या पूर्वजीं स्थापिला। तो उपकार स्मरोनि वहिला। सेतुबंधाचा विचार भला। सागरें वहिला सांगितला॥११०॥ सुग्रीवाचा सेनापती। त्या नळाचेनि पाषाण तरती। सेतु बांधोनि त्याचे हातीं। लंकेप्रती सुखें जावें॥११॥ ऐकोनि सुमित्रानंदन। स्वयें झाला हास्यवदन। श्रीराम आपुलें महिमान। गौण करोन सांगत॥१२॥ ऐकें जानकियें माते। उतरावया वानरांतें। मार्ग मागतां सागरातें। श्रीरामातें भेटेना॥१३॥ तेणें क्षोभला रघुनंदन। शोषावया सागरजीवन। सीतीं[6] सज्जिला अग्निबाण। अपांपति तेणें भयभीत॥१४॥ स्त्रीपुत्रांसमवेत। श्रीरामा झाला शरणागत। पूजोपचार अद्भुत। घेवोनि त्वरित पुढें आला॥१५॥ विचित्राकृति वचन। स्वयें करोनि आपण। सुप्रसन्न रघुनंदन। सागरें जाण पैं केला॥१६॥

शरणागत सागरावर सोडावयाचा बाण मरुदैत्यावर मारवाडात सोडल्यामुळे तो प्रदेश ओसाड झाल्याचे सांगतात : अति संकट पडिलें तेथ। मारूं नये शरणागत। सत्यप्रतिज्ञ रघुनाथ। बाण निश्चित परतेना॥१७॥ ऐसें संकट पडिलें भारी। बाण घालूं कोणावरी। तंव आठवलें झडकरी। मरुदैत्यावरी सोडावा॥१८॥ मरुदैत्य मारवाडांत। प्रजा पीडित समस्त। बाण सोडोनियां त्वरित। केला घात पैं त्याचा॥१९॥ वधूनियां तयासी। बाण भेदला भूमीसीं। अग्निबाणाची

शब्दार्थ : १. सर्प, २. युक्तीने, ३. आसमंती, आसपास, ४. प्रमुख, ५. चिखल, ६. धनुष्याचे दोरीला.

आगी कैसी। जळ ते [illegible] ॥१२०॥ तेथेंही केलें विंदान। अग्निच वोळला संपूर्ण। गाई दुभती गहन। तृष्णा जाण निमाली॥२१॥ उदक मागों येती अतीत[१]। त्यांसी क्षीरपान करवित। कृपा वोळला रघुनाथ। केला अद्‌भुत पवाडा[२]॥२२॥

सागर ओलांडून रामांचे विमान बिभीषण भेटीच्या ठिकाणी आले : ऐसें सांगतां जानकीसी। तंव लंघिलें सागरासी। जेथें भेटी बिभीषणासीं। त्या ठायासीं पैं आलें॥२३॥ सीते तुजलागीं जाण। बहु कष्टला बिभीषण। नानापरी रावण। शिकवितां जाण नायके॥२४॥ निग्रहोनि सांगतां त्यासी। लत्ताघातें बिभीषणासी। हाणितां अति आवेशीं। आला श्रीरामासी पैं शरण॥२५॥ तेणेंचि काळें रघुनाथें। अभिषेकिलें बिभीषणातें। निवटोनि रावणातें। मग तूतें सोडविलें॥२६॥ तुजलागीं सेतुबंधन। केलें तें अक्षयी पूर्ण। मिनलिया सुरसिद्धगण। अन्यथा कोण करूं शके॥२७॥

देवदैत्यमनुष्येषु नैतदन्यः करिष्यति। पश्य सागरमक्षोभ्यं वैदेहि वरुणालयम्॥१७॥

सर्वथैव अशक्य असूनही मारुतीने अर्धा सेतू बांधून पूर्ण केल्याचे सांगतात : अति अक्षोभ्य सागरीं। नाना श्वापदांचिया थोरी। जो न कल्पवे मनेंकरीं। तो क्षणाभीतरीं बांधिला॥२८॥ देवदैत्यादि दानव। पन्नग[३] आणि मानव। मिळाल्या त्रैलोक्य सर्व। न करवे स्वयमेव अन्यथा॥२९॥ एकल्या हनुमंतें पूर्ण। सप्त पर्वत आणोनि जाण। एक उणें पन्नास योजन। सेतुबंधन संपविलें[१]॥३०॥ इतर वानरीं समस्तीं। अर्ध बांधिला अपांपती[४]। अर्थ उरला तो मारुतीं। सेतुसमाप्ती पैं केली॥३१॥ ते हे सेतुबंधनख्याती। अगाध श्रीरामाची कीर्ती। युगायुगीं वाखाणिती। जड उद्धरिती श्रीरामचरित्रें॥३२॥

रामेश्वरक्षेत्राचे महिमान : ऐसें सांगतां चरित्र। पुढें देखिला रामेश्वर। तेथील माहात्म्य अपार। वदावया वक्त्र[५] मज कैंचें॥३३॥ ब्रह्महत्याचिया कोटी। दर्शनीं जळती उठाउठीं। त्याच्या महात्म्याची गोष्टी। कैंवी वाक्पुटीं बोलवे॥३४॥ परी कृपाळु जनार्दन। जो अवतरला रघुनंदन। तो मनामाजी प्रवेशोन। चरित्र पूर्ण वदवीतसे॥३५॥ राम मनाचें अमन मन। राम चित्ताचें निजचिंतन। बुद्धिबोधाचा निश्चियो पूर्ण। स्वयें आपण श्रीराम॥३६॥ श्रीराम अभिमानाचा अभिमान। स्वयें सोडूं सिद्ध करून। दांडोरा पिटी चरित्रकथन। आपुलें आपण करीतसे॥३७॥ न लिही म्हणता हें चरित्र। श्रीराम हृदयीं हृदयस्थ। तो राहूं नेदी निवांत। अंतरीं करित महामार॥३८॥ देहगेहाची आवडी। सांडवोनि स्त्रीपुत्रांची गोडी। निजचरित्र अति आवडीं। निजनिर्वडीं[६] चालवित॥३९॥ जेथें जेथें ममता जात। तेथें तेथें पावोनि रघुनाथ। समूळ ममतेचा निःपात। तत्काळ करीत श्रीराम॥१४०॥ लोभें जाय ममता द्वारीं। तंव राम स्मरोनि झडकरीं। समूळ त्याची करोनि बोहरी[७]। वदवी निर्धारीं रामकथा॥४१॥

गावबाची सद्‌गुरु एकनाथांना विनंती : शरण एकी एकनाथा। जनार्दना सर्वगता। माझें कांहीं न चले आतां। कर्ता करविता तूं स्वामी॥४२॥ एका जनार्दना शरण। दांडोरा पिटी ग्रंथकथन। चालवी एका जनार्दन। रामेश्वरकथन अवधारा॥१४३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां पुष्पकारूढगमनं नाम त्रिसप्ततितमोऽध्यायः॥७३॥ ओंव्या॥१४३॥ श्लोक॥१७॥ एवं॥१६०॥

---

शब्दार्थ : १.पांघरूण, २. कीर्ती, ३. सर्प, ४. समुद्र, ५. तोंड, ६. निजानंदाने, ७. संहार, ७. नाश.

# अध्याय चौऱ्याहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## श्री शंकर - हनुमंत भेट

श्रीरामाचें निजचरित्र गहन। सांगतां सौमित्र विचक्षण। ऐकती जानकी सावधान। सर्वांगश्रवण करोनी॥१॥ धन्य श्रवणार्थी सादर सीता। धन्य धन्य तो सौमित्र वक्ता। धन्य चरित्र रामकथा। अनागतवक्ता वाल्मीकी॥२॥ कलियुगीं धन्य जन ते। अखंड गाती रामचरित्रातें। धन्य धन्य ते सादर श्रोते। कथामृत सेविती॥३॥ श्रवणद्वारें कथामृत। सेवितां अंतर निर्धूत[1]। प्रकटोनियां रघुनाथ। उद्धरीत जडजीवां॥४॥ श्रीरामाचें चरित्र गहन। क्रमें संपलें सेतुबंधन। पुढें रामेश्वराचें आख्यान। वर्णी कोण साकल्यें[2]॥५॥ अनंत कथा सेतुमाहात्म्यीं असती। तितुकी आकळावया कैंची मती। किंचित सांगेन कथासंगती। क्षमा श्रोतीं करावी॥६॥ क्षमा करा म्हणावयालागीं। सामर्थ्य कैंचे माझ्या अंगीं। जनार्दनकृपा सत्संगीं। केलों जगीं पैं सरता[3]॥७॥ तेणें एका एकपणा। पैठा जालों संतचरणां। तये धीटवेकरोनि जाणा। निःशंक विनवणा करीतसे॥८॥

**सेतुमाहात्म्यात आलेली रामेश्वराच्या निर्मितीची पूर्वकथा :** किष्किंधेहूनि श्रीरघुवीर। सवें वानरांचा भार। नामें गर्जती अपार। भुभुःकार गोळांगुळीं॥९॥ भुभुःकार जयकारध्वनी। वानरांच्या उड्डाणकिराणीं। राम निघाला गजरेंकरोनी। खांदीं बैसोनी हनुमंताच्या॥१०॥ हनुमंत झाला श्रीरामवाहन। मज अंगदें उचलोन। खांदीं घेतलें प्रीति करून। आले ठाकून समुद्रतीरा॥११॥ अपूर्व झालें तये ठायीं। श्रीरामा शिवदर्शनाचा नेम पाहीं। समुद्रतीरीं तें नाहीं। न चले कांही सर्वथा॥१२॥ गुंती पडली फळआहारा। तटस्थ सर्वही वानरा। संमुख येती रघुवीरा। वाग्व्यापारा न करवे॥१३॥

**शिवदर्शनावाचून रामांचे भोजनादि व्यवहार थांबले:** शिवदर्शनेंवीण जाण। श्रीराम न करी फळभोजन। गुंती पडली दारुण। कांही विंदाण चालेना॥१४॥ जरी स्वयें आत्माराम। तरी स्थापावया भजनधर्म। शिवदर्शनाचा नित्य नेम। अति निःसीम चालविता॥१५॥ सकळ तीर शोधितां पाहीं। प्रतिमालिंग न दिसे कांहीं। तेणें सचिंत होवोनि अवघेही। करणी कांही चालेना॥१६॥ जरी स्वयें आत्माराम। तरी स्थापावा भजनधर्म। स्वयें करिताहे कर्म। पुरुषोत्तम आपण॥१७॥ सचिंत होवोनि अवघे। विचार करिती निजभावें। स्वतां युक्ती न संभवे। हें पुसों जावें श्रीरामा॥१८॥ कैसेनि होईल लिंगप्राप्ती। कोण उपाव कैशा स्थितीं। हे न पुसतां रघुपती। आणीक युक्ती स्फुरेना॥१९॥

**सर्वांची मारुतीला प्रार्थना :** पुसावया श्रीरघुनंदना। येवढी आंगवण कोणा। तुजवांचून वायुनंदना। आणिका वदन पैं कैंचे॥२०॥ मिळोनियां सकळ जुत्पती। विनविते झाले मारुती। आहारासीं पडली गुंती। विचार रघुपती पुसें वेगीं॥२१॥ ऐकोनियां तें वचन। पुढें झाला वायुनंदन। लोटांगणीं रघुनंदन। कर जोडून विनविला॥२२॥ ऐकें स्वामी रघुनाथा। अवघे वीर विचारितां। शिवलिंग नाहीं सर्वथा। त्यासी आतां काय करणें॥२३॥ खुंटल्या वानरांच्या युक्ती। बुद्धि न स्फुरे लिंगार्थी। स्वामी सांगती जया स्थितीं। त्याच रीतीं साधेल॥२४॥ गुरुमुखें तत्वतां। वस्तुनिश्चय दृढ न होतां। कोटि जन्म फेरे खातां। न पवे सर्वथा कल्पांतीं॥२५॥ ऐसें विनवितां हनुमंता। अति संतोष रघुनाथा। हृदयीं आलिंगोनि

---

**शब्दार्थ :** १. पवित्र. २. संपूर्णपणे, ३. मान्य.

तत्वतां। होय सांगता लिंगप्राप्ति॥२६॥ सेतुबंधाची ख्याती। विस्तारावया त्रिजगतीं। जडजीवां उद्धारगती। करावया युक्ती योजिली॥२७॥ नाहीं वेदशास्त्रव्युत्पत्ती। गाठीं नाहीं तप:संपत्ती। गंध नाहीं सत्संगती। त्यांसी गती कैसेनि॥२८॥ ऐसी पुढिलांची चिंता। उपजली श्रीरघुनाथा। तये कृपेस्तव तत्वतां। होय योजिता उपाव॥२९॥ अति प्रीतीं हनुमंताप्रती। सांगता होय रघुपती। अति कठिण लिंगप्राप्ती। दुर्गम स्थिति तयाची॥३०॥ स्थावर लिंगासीं चळण। सर्वथा करों नये जाण। म्हणोनि मांडिलें कठिण। दुर्गम जाण लिंगप्राप्ति॥३१॥

श्रीरामांनी शिवदर्शन घेऊन येतो असे म्हणताच सर्वजण भयभीत : तुम्हीं समस्तीं रहावें येथें। मी जाईन शिवदर्शनातें। पूजोनिया सदाशिवातें। शीघ्र येथें येईन॥३२॥ ऐकतां श्रीरामवचन। हनुमान झाला मूर्च्छापन्न। हातींचा गेलिया रघुनंदन। वृथा जीवोन भूमिभार॥३३॥ कठिण ऐकतां वचनार्थ। सुग्रीवादि समस्त। वानर झाले मूर्च्छाभूत। मजही तेथ मूर्च्छा आली॥३४॥ कांही न चले विवंचन। सकळ झाले मूर्च्छापन्न। तें देखोनियां रघुनंदन। स्वयें आपण कळवळला॥३५॥ कुरवाळूनि अमृतहस्तीं[1]। रामें उठविला मारुती। लिंगप्राप्तीसीं एक युक्ती। माझ्या चित्तीं स्फुरलीसे॥३६॥ परी ते कष्ट तुम्हांसी। म्हणोनि शंका मानसीं। काल आणिलें सीताशुद्धीसी। अति कष्टेसीं रणमारें॥३७॥ सवेंचि आजि दुसरें। संकट घालावें एकसरें[2]। म्हणोनि सांगतां न सरे। मन घाबिरें होतसे॥३८॥

रामाज्ञा पाळणे ही मारुतीची उत्कंठा : ऐकोनियां तें वचन। हनुमान घाली लोटांगण। देह तुझे कृपेंकरून। वर्तत जाण श्रीरामा॥३९॥ तुझिया नामस्मरणापुढें। संकट कायसें बापुडें। फोडून काळाचें दाभाडें। नामें माकडें अनिवार॥४०॥ वैकुंठ कैलास सत्यलोक। पाटां वाटीन मृत्युलोक। लिंगप्राप्तीलागीं देख। पाताळलोका भेदीन॥४१॥ आज्ञा करितां रघुपती। जैशा रीतीं होय प्राप्ती। तैसी तैसी साधीन युक्ती। नामें मारुति गर्जत॥४२॥ पाडून काळाचे दांत। ख्याती करीन त्रैलोक्यांत। आज्ञा करितां श्रीरघुनाथ। शोधीन समस्त ब्रह्मांड॥४३॥ तुझे नामें रघुपती। कोण दुष्कर त्रिजगतीं। आज्ञा द्यावी शीघ्रगती। लिंगप्राप्ती होय कैसी॥४४॥

मारुतीला काशीविश्वेश्वराचे माहात्म्य सांगतात : ऐकोनियां तें वचन। संतोषला रघुनंदन। हृदयीं धरिला आलिंगून। दुर्लंघ्य कोण तुजलागीं॥४५॥ आनंदवन महाश्मशान। अविमुक्त। वाराणसीस्थान। मोक्षपुरींमध्ये मणि जाण। वेदपुराणसंमत॥४६॥ तये काशीपुरीमाझारीं। कृपाळु राजा त्रिपुरारी। तारक ब्रह्माच्या निजगजरीं। जन उद्धरी चतुर्विध॥४७॥ अंडज जारज स्वेदज पूर्ण। चौथे उद्भिज्ज पैं जाण। तितुकें शिवकृपेंकरून। मोक्षसद्न[3] पावे॥४८॥ महापापें हो कां पतित। देह ठेवितां काशीआंत। यमयातने देवोनि लात। नित्य निर्मुक्त स्वयें होती॥४९॥ अगाध वाराणसीची थोरी। शिवें धरिली त्रिशूळावरी। लागली दिसताहे वसुंधरीं[4]। अलिप्त निर्धारीं धरेसीं॥५०॥ देव पदाभिमानें शिणले। ते मोक्ष पावावया वहिले[5]। शंकरासी शरण गेले। धरणें केलें आनंदवनीं॥५१॥ ब्रह्मा विष्णु मरूद्रण[6]। लोकपाळेंसीं पाकशासन[7]। सनकादिक सिद्ध जाण। ऋषिगण वसिष्ठादि॥५२॥ यक्ष किन्नर सिद्ध चारण। वाराणसीचे किंकर जाण। शोभा कैलासाहून गहन। वैकुंठ जाण पुढें सरेना॥५३॥ क्षेत्रपाळांचें नित्य रक्षण। अहर्निशीं सावधान। विघ्नांसी प्रवेश तेथें कैसेन। दारुण शासन दंड पाणीचें॥५४॥

---

शब्दार्थ : १. विचार, २, लगेच, ३. मोक्षाचे स्थान, ४. पृथ्वीला, ५. तत्काळ, ६. देववृंद, ७. इंद्र.

काशीला जाऊन शंकरांना दर्शनार्थ लिंग देण्याची विनंती करण्यास श्रीराम हनुमंताला सांगतात : येथें जावोनि आपण। सदाशिवासी लोटांगण। अति प्रीतीं घालोनि पूर्ण। माझें विनवण सांगावें ॥५५॥ सीताशुद्धीचे कार्यार्थ। साधावया श्रीरघुनाथ। वानरसैन्यासमवेत । आला त्वरित समुद्रतीरा ॥५६॥ शिवदर्शनावीण तत्वतां। फळ मूळ श्रीरघुनाथा। नाहीं घेणें सर्वथा । तरी पाहतां शिवलिंग न मिळे ॥५७॥ म्हणोनियां स्वामीप्रती। मज पाठविलें लिंगप्राप्ती। ऐसें सांगतां शिवाप्रती। लिंग निश्चित देईल ॥५८॥ ऐसें जरी योजेल। तरी लिंगप्राति होईल। अन्यथा श्रमचि उरेल। परी न होईल लिंगप्राप्ति ॥५९॥ ऐसें सांगतां रघुनाथा। आवेश आला हनुमंता। नमन करोनियां तत्वतां। होय विनविता श्रीरामा ॥६०॥

हनुमंताची काशीस जाण्याची तत्परता : तुझेनि प्रतापें रघुनाथा। कोणे पदार्थीं दुर्गमता। आम्हां नाहीं गा सर्वथा। जाईन आतां क्षणमात्रें ॥६१॥ कोणीकडे तें काशीपुर। मज सांगावें सत्वर। कृपा करोनि रघुवीर। आज्ञा सत्वर मज देई ॥६२॥ ऐकतां हनुम्याचें वचन। संतोषला रघुनंदन। अति प्रीती आलिंगून। निजविवंचन[1] सांगत ॥६३॥ येथोनि थेट उत्तरेसीं। विंध्याद्रीचे पैलदेशीं। अति विशाळ नगर काशी। तेथें विश्वेश्वरासी निवास ॥६४॥

मारुतीच्या आवेशपूर्ण उड्डाणाने चराचर आंदोळले : अयोध्येचा निजप्रदेश। अंतर त्यासी योजनें वीस। ऐकतांच वानरेश। केलें सावेश उड्डाण ॥६५॥ नमन करितां तये वेळीं। पिंजारल्या रोमावळी। मस्तक नेला मुंडपातळीं। विचित्र शैली नेत्रांची ॥६६॥ भुभुःकार देतां वानरें। बैसलीं काळांची दातेरें। दिग्गज झाले पैं घाबरे। टाळी एकसरें बैसली ॥६७॥ ऐकतांचि भुभुःकारासी। धाकें शारें[2] आलें मेघांसी। दांतखिली बैसली त्यांसी। गडगर्जनेसी विसरले ॥६८॥ वळोनि पुच्छाचा आंकोडा। उडतां आवेश माकडा। सागर खळबळिला गाढा[3]। पडिला तडा पृथ्वीसीं ॥६९॥ जवळी होता रघुनाथ। म्हणोनि भ्याला अंगवात। तेणें वानर जीवें जीत। राहिले स्वस्थ रामबळें ॥७०॥ वृक्षां लागतां तो वारा। वेगें उडाले अंबरा। भ्रमण करितां गरगरां । विस्मयो रघुवीरा उड्डाणें ॥७१॥ मागें सांडोनि चंद्र । गगना उसळला कपींद्र। लोकपतीचेंही नगर। अति सत्वर डावलिलें[4] ॥७२॥ शेषाद्रि आणि श्रीशैलगिरी। किष्किंधाद्रि प्रस्रवणगिरी। मागें सांडोनियां सह्याद्री। ब्रह्मगिरी ओलांडिला ॥७३॥

मारुती काशीत येऊन रामनामसंकीर्तन करीत विश्वनाथाच्या दर्शनार्थ निघाला : विंध्याद्रिआदि सकळ गिरी। क्षणमात्रें कपिकेसरी। लंघोनियां झडकरी। काशीपुरी पावला ॥७४॥ रामनामाचे कल्लोळ। ऐकतां तटस्थ झाले रक्षपाळ। देखतांचि गोळांगुळा। आश्चर्य सकळ मानिती ॥७५॥ श्रीरामनाम ऐकतां। निषेध न करवे सर्वथा। सकळां झाली तटस्थता। कपि देखतां विस्मित ॥७६॥ पाहतां दिसे वानर। मुखीं रामनामोच्चार। पराक्रमें महावीर। कालग्निरुद्र दिसताहे ॥७७॥ आमुच्या स्वामीचें ध्येय जाण। याच्या मुखीं त्याचें स्मरण। यासी निषेधितां आपण । शिव संपूर्ण क्षोभेल ॥७८॥ ऐसें जाणोनि समस्त। उगेच राहिले तटस्थ। हनुमान निघाला नगरांत। श्रीविश्वनाथदर्शना ॥७९॥

वाराणशीचे सौंदर्यवर्णन : हाटवटिया[5] चौबारे। सप्तखणांचीं दामोदरें[6]। पंचप्रकारें विचित्रें। रचिलीं शंकरें त्रिशूळावरी ॥८०॥ प्रतिराउळीं परिकरीं। कोठडिया बाह्यांतरीं। प्रतिहारिका नवनारी। निगमागम साचारीं द्वारें नव ॥८१॥ सुंदर उभवणी चिंतामणींची। घरीं दुभतीं कामधेनूंचीं। वनें उद्यानें कल्पतरूंचीं। शोभा नगरीचीं अनुपम ॥८२॥ तेथींचे जे निजजन।

शब्दार्थ : १.आपला विचार, २. कापरे, ३. अत्यंत, ४. मागे टाकिले, ५. बाजार, ६. गृहे.

त्यां अखंड शंकराचें ध्यान। रुद्राक्षांचें आभरण। भस्मोद्धूलन सर्वांगीं ॥८३॥ शिवनामाची मुद्रा सार। सुखरूपचि व्यवहार। शिवनामें निरंतर। गर्जती नर सर्वदा ॥८४॥ तेथें राजा श्रीशंकर। मथूनियां श्रुतिसागर। उपनिषदूनवनीतसार। वेगवत्तर काढिलें ॥८५॥ तेंचि उपनिषदूनवनीत। बोधाग्नी करोनि तप्त। रामनाम सार घृत। परमामृत जीवांसीं ॥८६॥

पायं पायं श्रुतिचलकितं रामनामामृतं यद्ध्यायं ध्यायं मनसि सततं ब्रह्म तत्तारकाख्यम्।
जापं जापं प्रकृतिविकृतौ प्राणिनां कर्णमूले वीथ्यां वीथ्यामटति जटिल: कोपि काशीनिवासी॥१॥

श्री शिवशंकरांची रामप्रीती: जटाधारी दिगंबर। उमाकांत कर्पूरगौर। काशीपुरीं श्रीशंकर। राजा निरंतर नांदत ॥८७॥ तेणें रामनाम परमामृत। श्रुतीच्या चुळीं प्राशूनि प्रीतियुक्त। काशीच्या बिदोबिदीं धांवत। पुकारित डांगोरा ॥८८॥ श्रीराम परम कल्याण। पूर्णब्रह्म चैतन्यघन। माझें जीवींचें निज गुह्य पूर्ण। समाधान मज तेणें ॥८९॥ श्रीरामें जीवा जीवपण। श्रीरामें शिवा शिवपण। जीवशिवांची बोळवण। चैतन्यघन श्रीराम ॥९०॥ तें माझें निजगुह्य पूर्ण। निजकृपेंकरोन जाण। सांगतसे हाक फोडून। अति प्रीतीनें निजभक्तां ॥९१॥ प्रकृतित्यागाचे[1] अंतीं। श्रवणीं उपदेशी एकांतीं। ब्रह्म तारक ज्यातें म्हणती। तें हे निश्चितीं रामनाम ॥९२॥ श्रवणद्वारें करितां प्राशन। चित्ताचें होय चैतन्यघन। मन तेचि उन्मन[2] जाण। अहं तें सोहं संपूर्ण श्रीरामें ॥९३॥ बुद्धि तेंचि समाधिधन। इंद्रियांचें मोडलें भान। अनुभवितां पैं चिद्धन[3]। परिच्छिन्नपण[4] मग कैचें ॥९४॥ एवढा उपदेशाचा बडिवार। देवचतुष्टयाचा संहार। वचनमात्रें साक्षात्कार। चिदचिन्मात्र स्वयें होणें ॥९५॥ कृमिकीटकपतंगादि पहाहो। काशीमाजीं सांडितां देहो। सांडोनियां देहभावो। परब्रह्म पहाहो स्वयें होती ॥९६॥ अगाध स्मरणाचा बडिवार। देखतांचि तो वानर। करितां रामनामाचा भुभु:कार। दर्शना सत्वर चालिला ॥९७॥ श्रीरामभजनीं अति आदर। नित्य सावधान शंकर। पळें पळें एकाकार। ध्यान निरंतर रामाचें ॥९८॥ बाप[5] ध्यानाचा बडिवार। येरे वेधियेला येर। ध्यानबळें पैं साचार। वर्ण सत्वर पालटले ॥९९॥ महादेव तमोगुण। मेघश्याम त्याचा वर्ण। श्रीरामाचें करितां ध्यान। झाला पूर्ण कर्पूरगौर ॥१००॥ श्रीराम शुद्ध सत्वात्मक निर्मळ। तो शंकरध्यानें प्रबळ। मेघश्यामता अविकळ। बाणली तत्काळ श्रीरामा ॥१॥

श्रीशंकरांचे स्वरूपवर्णन: तैसा श्रीरामध्यानें प्रबळ। शिवगोक्षीरधामधवळ[6]। पंचवक्त्र[7] जटाविशाळ। दीप्ति प्रबळ त्रिनेत्रा ॥२॥ दशभुजा अति विस्तीर्ण। श्मशानरजउधळण। सर्वांगीं पन्नगभूषण। त्याचेंही लक्षण अवधारीं ॥३॥ विषयत्यागें जीं साचार। सर्वेंद्रियें निर्विकार। तेचि शिवाअंगीं अलंकार। अति परिकर शोभत ॥४॥ निवटूनि अहं गजासुर। सोहं चर्म सनखाग्र। काढोनि प्रीतिपुर:सर। बहिर्वस्त्र प्रावरणा ॥५॥ सिद्ध साधका नागवे पूर्ण। क्षणें नागवती तपोधन। तो निवटोनि क्रोधपंचानन। शांतिचर्म जाण काढिलें ॥६॥ सबाह्याभ्यंतरी अढळ शांती। सनख चर्म निश्चितीं। तेंचि प्रावरण पशुपती। अंतरस्थिती अंतरवास ॥७॥

श्रीशंकरांच्या दहा आयुधांचे रूपकात्मक वर्णन: दशभुजांसीं परिकर। दशायुधें अति विचित्र। नांवें सांगेन सविस्तर। श्रोते सादर परिसोत ॥८॥ त्रिगण त्रिपुर अति दारुण। त्यासी निवटितां संपूर्ण। बोधाचा त्रिशूळ जाण। अति तीक्ष्ण तिधारा ॥९॥ मूळ वेद तोचि डमरु। अनुहताचा नाद गंभीरु। सात्विकाचें निज अंतरु। प्रीतिपुर:सरु जागवित ॥११०॥ समूळ आशा छेदी सत्वर। द्वैतदळणी सतेज धार। असिलता[8] मुष्टींसीं परिकर। सुरासुर कांपती ॥११॥ स्वानुभवाचें

शब्दार्थ : १. देहत्यागाचे, २. अविद्यामायारहित, ३. चित्स्वरूप, ४. वेगळेपण, ५. अत्यंत मोठा, ६. गाईच्या दुधाच्या प्रमाणे शुभ्र. ७. शंकर, ८. तरवार.

वोडण[1] जाण। सर्वेंद्रियीं सावधान। अन्य भासों नेदी भान। संरक्षण निजबळें ॥१२॥ आच्छादोनि स्वपक्षासी। शोधोनि निरासी द्वैतासी। वोडणखड्गांची कळा ऐसी। विपक्षासी उरों नेदी ॥१३॥ पाषांडी सैरा भरती रान। त्यांसी भक्तिपाशीं आकळून। स्वधर्मा आणोन पूर्ण। भावफरशें खंडन तर्कांचें ॥१४॥ सायुज्याचा मेढा संपूर्ण। अनुसंधानाचा तीक्ष्ण बाण। निजसामर्थ्येंकरोनि जाण। करीत कंदन अनंगाचें[2] ॥१५॥ प्रमादें[3] अधःपातासीं। जातां कृपेच्या अंकुशासीं। ओढून आणी निजपदासी। छेदी दोषांसी खट्वांगें ॥१६॥ मनोहर दिगंबरशैली। अर्धांगीं शैलबाळी। नंदिकेश्वर दृष्टीतळीं। मेढा वळी आसनस्थ ॥१७॥ चंडीशादि भृंगी बाण। सकळां मुख्य गजवदन। महाविघ्नांचें निवारण। नामस्मरण केलिया ॥१८॥

श्रीशिवशंकर-हनुमंताची भेट: ऐसें देखतां हनुमंतासीं। आल्हाद झाला निजमानसीं। गर्जोनियां जयजयकारासीं। लोटांगणासी घातलें ॥१९॥ शिवें जाणोनि निजव्रत। उठोनि आलिंगिला हनुमंत। होय साचार रामदूत। हृद्गत[4] सर्व कळलें तें ॥१२०॥ माझा स्वामी रघुनाथ। तेणें पाठविला दूत। म्हणोनि आलिंगिला हनुमंत। प्रेमा अद्‌भुत श्रीरामीं ॥२१॥ हनुमान सहज श्रीरामभक्त। शंकरा सबाह्य रघुनाथ। दोघांही प्रेम अद्‌भुत। दोघेही मूर्च्छित पडियेले ॥२२॥ हनुमान रुद्राचा अवतार। स्वयें तोचि श्रीशंकर। उभयध्येय श्रीरामचंद्र। रूपें साचार अद्वय ॥२३॥ आपआपणां खेव[5] पडिलें। आपुलेनि सुखें सुखावलें। आपआपणा विसरले। बुडोनि गेले निजरूपीं ॥२४॥ गूळ भेटे गोडीसीं। दीप आलिंगी प्रभेसीं। कनकाअंगीं कांती जैसी। भेटी तैसी दोघांसी ॥२५॥ येरयेरां[6] विसरले। गणसमुदाय तटस्थ ठेले। कोणी कोणासी न बोले। अवघे राहिले चित्ररूप ॥२६॥ देखोनियां निजचिन्ह। गिळून समाधि उत्थान। शंकर नित्य सावधान। प्रभावेंकरून रामाच्या ॥२७॥

श्रीशंकरांनी मारुतीचा सत्कार करून, येण्याचे कारण विचारले : तेणें चेतविली चेतना। सावध केलें वायुनंदना। करोनियां पूजाविधाना। विवंचना होय पूसता ॥२८॥ कोठोनि येणें जालें स्वामी। कवण देश कवण भूमी। कवण तुमचा निजस्वामी। कवणे हेतू तुम्हीं बीजें[7] केलें ॥२९॥ तनु दिसताहे वानर। मुखीं रामनामोच्चार। तुम्ही वनचर तो परात्पर। केंवी उच्चार नामाचा ॥१३०॥

हनुमंतानें श्रीरामकार्याचा पूर्ववृत्तांत निवेदन केला : ऐकतां श्रीशंकरवचन। हनुमान घाली लोटांगण। माथां वंदोनि आज्ञापन। यथामति जाण सांगत ॥३१॥ जो सृष्टीपूर्वी सनातन। सृष्टिरूपें जो आपण। सृष्टीच्या अवसानीं अनवच्छिन्न[8]। उरे परिपूर्ण अद्वय ॥३२॥ जो नामरूपातीत। पूर्णब्रह्म सदोदित। तोचि झाला मूर्तिमंत। निजभक्तकैवारा ॥३३॥ पौलस्तीचा रावण। लंकापति दारुण। राक्षसी तनु उन्मत्त पूर्ण। बंदीं सुरगण घातले ॥३४॥ विरोध केला सकळांसीं। उच्छेदिलें गोब्राह्मणांसी। पीडों आदरिलें अवनीसी[9]। शरण रामासीं ते आली ॥३५॥ जो सच्चिदानंदघन। जो अरूप अपार निर्गुण। ज्यातें ध्याती योगिजन। त्याचें अभिधान[10] श्रीराम ॥३६॥ जो सच्चिदानंदघन दुर्गम। ज्यासीं निजरूपीं आराम। ज्ञानरूप ज्ञानगम्य। त्यातें श्रीराम बोलती ॥३७॥ तो भक्तकामकल्पद्रुम। नियत करोनि वैकुंठधाम। नांदतसे आत्माराम। अविश्रम समेसहित ॥३८॥ मिळोनियां सुरगण। त्यासीं आले अनन्य शरण। सकळां अपराधी रावण। त्याचें निर्दळण करावया ॥३९॥ अत्यंत भाकितां करुणा। कृपा उपजली रघुनंदना। आश्वासिलें सुरगणां। वध रावणा मी करीन ॥१४०॥ तुम्हीं सकळ

शब्दार्थ : १. ढाल, २. कामाचे, मदनाचे, ३. चुकीने, तमोगुणाने, ४. मनातील भाव, ५. आलिंगन, ६. एकमेकांस, ७. आगमन, ८. दिग्देशकालादि मर्यादारहित, ९. पृथ्वीला, १०. नाव.

सुरवर। रूपें व्हावें वानर। मूळमाया कलहसूत्र। जानकी सत्वर होईल॥४१॥ मी स्वयें सूर्यवंशाप्रती। नामें श्रीराम दाशरथी। अवतरेन शीघ्रगतीं। निमेषगतीं न लागतां॥४२॥ रावण करील सीताहरण। तोचि अपराध ठेवोनि जाण। क्षणें निवटीन रावण। ऐकतां वचन सर्व सुखमय॥४३॥ जो व्यक्ताव्यक्तातीत[1]। पूर्णब्रह्म सदोदित। तो अवतरला रघुनाथ। सूर्यवंशात दाशरथी॥४४॥ पितृआज्ञेकरोनि जाण । दंडकारण्या वनप्रयाण । तेथें त्रिशिरा खर दूषण । विंधोनि बाण निवटिले ॥४५॥ मुक्त करोनि जनस्थान। श्रीरामें द्विजां दिधलें दान। तेणें तळमळिला रावण। करोनि छळण सीता नेली॥४६॥ श्रीरामाचे दृष्टी पडता। तरी क्षणें निवटिता लंकानाथा। संन्यासिरूपें परोक्षता[2]। चोरोनि सीता पैं नेली॥४७॥ श्रीरामापासीं दुर्धर बाण। परंतु एकला न मारीच रावण। करावें सकळनिर्दळण। म्हणोनि प्राण राखिले॥४८॥ दर्भशिखेभेणें देखा। काक हिंडविला तिहीं लोकां। तेथें मारितां दशमुखा। रघुकुळटिळका काय नवल॥४९॥ मारिलिया लंकानाथ। सकळ खंडेल वनवासव्रत। म्हणोनि राखिला हात। बहुत कार्यार्थ वनवासीं॥१५०॥ सीताशुद्धीचेनि मिषें जाण। सकळ उद्धरावें दंडकारण्य। म्हणोनि चालिला रघुनंदन। जगदुद्धरण करावया॥५१॥ जटायु उद्धरिला पक्षी। वनस्पति अनेकी। गुल्मलता सकळिकी। तृणपाषाण शेखीं[3] उद्धरिले॥५२॥ शरभंग आणि शबरी पहाहो। रामें उद्धरिला ऋषिसमुदावो। ब्रह्मराक्षसांचा क्रूर भावो। तेही रामरावो उद्धरी॥५३॥ सीतेचेनि स्पर्शे विराध। त्याचा श्रीरामें केला वध। ताटिका सकळमार्गरोध। करोनी वध उद्धरिली॥५४॥ पायीं उद्धरिली शिळा। गुरूचा याग सिद्धी नेला। हनुमान सांगतां भुलला। जाश्वनीळा[4] देखूनी॥५५॥ जो राम तोचि शंकर। तेणें हनुमंता प्रेमा थोर। सांगता विसरला चरित्र। पूर्वापर नाठवेचि॥५६॥ स्वस्थ करोनियां चित्ता। सिंहावलोकनें[5] रामकथा। सांगतां उल्लास हनुमंता। होय सांगता मागुतेनि॥५७॥ तुझें चाप त्रिपुरारी। भार्गवें[6] ठेविलें जनकमंदिरीं। जानकीच्या स्वयंवरीं। पण निर्धारीं हाचि राया॥५८॥ भार्गावआज्ञेकरोनि पहाहो। स्वयंवर मांडी जनकरावो। मूळें[7] पाठविलीं पहावो। दिग्मंडळीचें रावभूपाळां॥५९॥ स्वयंवर मांडिलें कोडें। पणास चाप आणविलें पुढें। ज्याचेनि हातें यासीं गुण चढे। जानकी रोकडें वरील त्यासी॥१६०॥ विश्वामित्राची प्रीति थोरी। जनक त्यासी मूळ करी। तोही पातला झडकरी। समयासारीं ठाकोनी॥६१॥ परिवारला ऋषिगणीं। शिष्यवर्गाची मांडणी। त्यांमाजी बंधु हे दोन्ही। राम आणि सौमित्र॥६२॥ तेथें पातला रावण। गर्वनिधी अति दारुण। पुसोनि धनुष्याचा पण। स्वयें आपण सज्जूं पाहे॥६३॥ आणविली नोवरी। गजस्कंधी सालंकारीं। देखतां विस्मयसुखकरी[8]। रावण धरी अभिलाष॥६४॥ खेचर भूचर विखार। जानकीवरणीं तत्पर। रावण दुरात्मा दुराचार। विषयबुद्धीं पामर अभिलाषी॥६५॥ जानकीभांगींचा वहिला । शेंदुरचर्चित तीक्ष्ण भाला। रावणहृदयीं खोंचला। तेणें तो झाला विव्हळ॥६६। विश्वार्चित विश्वमाता। विषयबुद्धीं अभिलाषितां। दुर्दशा आली लंकानाथा। भ्रम तत्वतां चढिन्नला॥६७॥ भ्रमाचे मदें जाण। चापीं चढवूं जाय गुण। तेणें क्षोभला त्रिनयन। विपरीत चिन्ह पैं झालें॥६८॥ माथा राहिला तळवटीं। तळधरिला वरिले मुष्टीं। कोपें क्षोभला धूर्जटी। गर्वे दृष्टी अंध झाली॥६९॥ अभिलाषितां विश्वमाता। विमुख झाली इंद्रियदेवता। धनुष्य बळें फिरवूं जातां। पडिलें तत्वतां उरावरी॥१७०॥ चंद्री लागली नेत्रीं विसी। खरसी[9] आली दशमुखांसी। प्राण रोधिला कंठदेशीं। दुःख कोणासी न सांगवे॥७१॥ कृपाळु जनक चक्रवर्ती। तेणें काढविलें शीघ्रगतीं।

---

शब्दार्थ : १. साकार आणि निराकाराहून भिन्न, २. मागे, ३. शेवटी, ४. शंकराला, ५. थोडक्यात, ६. परशुरामाने, ७. आमंत्रणे, ८. आश्चर्य व आनंद उत्पन्न करणारी, ९. फेस.

उठवोनि लंकापती। उदक सिंपिती मुखावरी ॥७२॥ दुर्दशा देखोनि लंकापती। राजे माथा तळीं करिती। अभिलाषितां सीता सती। घात निश्चितीं दिसतसे ॥७३॥ रायांकडे पाहे नृपती। तंव ते माथा नुधविती[1]। तेणें उद्वेगला भूपती। वीर निश्चितीं दिसेना ॥७४॥ निर्वीर हें उर्वीतळ। ऐसें बोलतां भूपाळ। आवेशला घननीळ। स्फुरण प्रबळ चालिलें ॥७५॥ बाहु थरकती आवेशीं। रोम उभारिले वेगेंसीं। आज्ञा पुसोनि गुरूसी। होय धनुष्यासी उचलिता ॥७६॥ आधींच शिवहस्तें पुनीत। वरी धरिता झाला रघुनाथ। तेणें होवोनि कृतार्थ। जीवन्मुक्त पैं झालें ॥७७॥ हातीं धरोनि रघुनंदन। धनुष्या चढवितां गुण। स्वयें मोडलें कडकडोन। नादें त्रिभुवन गर्जिन्नलें ॥७८॥ संतोष झाला सकळां। कुढाविलें[2] भूपाळा। जनक स्वयें संतोषला। जनकबाळा आनंदली ॥७९॥ गज पेलोनि[3] पुढारां। माळ घातली रघुवीरा। आनंद झाला सुरवरां। सुमनसंभारा वर्षती ॥१८०॥ जनकनंदिनी साधोन। विजयी झाला रघुनंदन। तें देखतांचि रावण। हृदयीं बाण खोंचला ॥८१॥ झाला अत्यंत लज्जायमान। नुघडीच काळें वदन। अधोवदनें केलें गमन। हृदयीं बाण खोंचलें ॥८२॥ तें देखोनि संतापला। रावणा संनिपात झाला। कामाभिलाषें भुलला। बरळों लागला सीते सीते ॥८३॥ तिये देखोनि अहर्निशीं। आधि[4] लागली रावणासी। आले ऐकोनि पंचवटीसीं। करी कपटासी साक्षेपें ॥८४॥ निजमातुळा मारीचासी। मृगवेष देवोनि त्यासी। सीता त्वचा मागे कंचुकीसीं। श्रीराम त्यासी मारूं गेला ॥८५॥ सौमित्र गेला श्रीरामापासीं। सीता एकली गुंफेसीं। रावण येवोनि संन्यासवेषीं। बळें जानकीसीं घेवोनि गेला ॥८६॥ जानकीहरणादि वृत्तांत। सांगीतला कबंधवधपर्यंत। पुढें वाळीचा केला निःपात। तोही वृत्तांत अवधारीं ॥८७॥ वाळी सुग्रीव बंधु वानर। राज्यलोभें दोघां वैर। सुग्रीवाची हरोनि दार । राज्यभ्रष्ट पैं केला ॥८८॥ स्त्रीराज्याचेनि दुःखे देखा। शरण आला रघुकुळटिळका। पावला देखोनि अति दुःखा। कृपापीयूखीं शिंपिलें ॥८९॥ विलग[5] मरण वाळीचें। विषम ताल कूर्मपृष्ठींचे। छेदिलिया मरण त्याचें। ऐसें वरदाचें महिमान ॥१९०॥ तितुके छेदोनि राघवें। वाळी निवटिला बाणलाघवें। सुग्रीव स्वदारेंशीं राज्यपावे। कृपावैभवें रामाच्या ॥९१॥ तेणें झाला कृतोपकार। ससैन्य सुग्रीव वीर। झालों श्रीरामाचे किंकर। हनुमान वीर नाम माझें ॥९२॥ तेथोनि सीताशुद्धिविचार। युवराजा वाळिकुमर। पाठविला अंगद वीर । सवें वानर देवोनी ॥९३॥ वेगीं [6]शुद्धि आणिली तिहीं। मग चालिले लवलाहीं। समुद्रतीरा येवोनि पाहीं। उपाव कांही योजिला ॥९४॥ काढोनियां अग्निबाण। सागर शोषावा संपूर्ण। चरणचालीं वानरगण। समुद्रलंघन करावया ॥९५॥ म्हणोनि क्षोभला श्रीरघुवीर। तंव शरण आला सागर। सेतुबंधनप्रकार। सविस्तर सांगितला ॥९६॥ शिळीं बांधला सेत। ऐकतां सुखावे रघुनाथ। वानरीं आणोनि पर्वत। निमेषें सेतु बांधिला ॥९७॥ पुढें करोनियां फळहार। उतरावया परपार। शिवपूजेलागीं सादर। श्रीरघुवीर पैं झाला ॥९८॥

'शिवलिंगदर्शन न झाल्यामुळे राम भोजनाविण खोळंबले आहेत:'' मारुती: शोधितां उभय तीरांतें। स्थावर लिंग न दिसे तेथें। अवघी झालीं सचिंतें। राम फळहारातें नेघे ॥९९॥ शिवदर्शनालागीं जाण। श्रीराम करूं पाहे गमन। तेणें गजबजिले वानरगण। वचनें प्राण जाऊं पाहे ॥२००॥ सुग्रीवादि सकळ वानरगण। शरणागत बिभीषण। घालोनियां लोटांगण। रघुनंदन प्रार्थिला ॥१॥ कोणेपरी लिंगप्राप्ती। होय ते सांगावी स्थिती। उपाय योजूं तदर्थीं। कृपामूर्ती श्रीरामा ॥२॥

शब्दार्थ : १. वर केला नाही, २. रक्षिले, ३. पुढे नेऊन, ४. चिंतन, ५. विलक्षण, ६. शोध.

"श्रीरामांनीच मला तुमच्या भेटीसाठीं पाठवलें आहे "मारुती : तेणें कळवळोनि मानसीं। सांगीतलें उपायासी। जावोनियां वाराणसीसी। विश्वेश्वरासी भेटावें ॥३॥ होवोनियां वानरवेषी। भाग्य उद्भट[१] आम्हांसी। श्रीरामसेवा आली फळासी। शिवचरणासी पावलों ॥४॥ फळहारालागीं रघुनाथ। बैसला असे तिष्ठत। विचारोनियां कार्यार्थ। आज्ञा त्वरित मज द्यावी॥५॥ म्हणोनि घाली लोटांगणा। शीघ्र करावी सूचना। विलंब करितां नये जाणा। रघुनंदन जाणा तिष्ठत॥६॥

रामकथाश्रवणाने शिवपार्वती आनंदरूप झाले: ऐकानि तें वचन। संतोषला त्रिनयन। आलिंगोनि वायुनंदन। प्रीती करोन पूजिला॥७॥ नित्य करीत ज्याचें स्मरण। आला देखोनि त्याचा गण। आनंद उथळला पूर्ण। उचलोन नाचत॥८॥ विसरोनि देहभावासी। नाचतां देखोनि शंकरासी। हर्ष दाटला गणांसी। ते प्रीतीसीं नाचती॥९॥ प्रेम उथळलें उमेसीं। तेहीं नाचो लागली कैसी। विसरोनि देहभावासी। उल्लासेंसीं नाचत॥२१०॥ गणांसी नाठवे गणपण। उमा विसरली उमापण। शिव भुलला शिवपण। रघुनंदननिजनामें॥११॥ अगाध स्थिती सदाशिवाची। अगाध प्रीति पार्वतीची। अगाध भक्ति हनुमंताची। कीर्ति रामाची वानितां ॥१२॥ एका शरण जनार्दनासी। तिघे विसरले तीनपणासी। अद्वैतबोधें[२] झालीं पिसीं। एकत्वेंसीं डुल्लत॥२१३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमंतशंकरदर्शनं नाम चतुःसप्ततितमोऽध्यायः॥७४॥ ओंव्या॥ २१३॥ श्लोक॥१॥ एवं॥२१४॥

॥१२०॥

## अध्याय पंचाहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### शिवलिंगासह मारुतीचे आगमन

मुक्त करोनि जनस्थान। ब्राह्मणां दिधलें दान। सुग्रीवासी किष्किंधाभुवन। सेतुबंधन सागरीं ॥१॥ अगाधबोध रघुनाथा। हें हनुमंतवचन ऐकतां। संतोष झाला उमाकांता। होय सांगता पूर्ववृत्त ॥२॥

श्री शंकर मारुतीला विंध्याद्रीची कथा सांगतात : ब्रह्मपुत्र श्रीनारद। सर्वेंद्रियब्रह्मबोध[3]। ब्रह्मवीणासुस्वरनाद। नित्य आनंद ब्रह्मपदीं ॥३॥ ब्रह्मानंदें डुल्लत। ब्रह्मसृष्टीं विचरत। भुवनें भुवन हिंडत। अधिकारियां देत परब्रह्म ॥४॥ उन्मत्तांसीं करोनि दंड। स्वेच्छा विचरत ब्रह्मांड। देखोनि विंध्याद्रि प्रचंड। आला नारद भेटीसीं ॥५॥ येरू उठोनि अति प्रीतीं। लोटांगण घातलें क्षितीं। पूजा करोनि नम्रवृत्तीं। स्वयें विनंती करीतसे ॥६॥ कोठोनि येणें झालें स्वामी। काय अपूर्व कोण भूमीं। कोणाच्या ठायीं कोण लक्ष्मी। बाहुल्यें तुम्ही देखिली ॥७॥ कोण कोण पर्वत। कोण ऐश्वर्ये वर्तत। सांगावें मज इत्थंभूत। कृपान्वित स्वामिया ॥८॥ तुम्हांसी सर्वत्र गमन। म्हणोनि केलें विज्ञापन। तुम्हांसी त्रैलोक्यीं वर्तन। कृपा करोन सांगावें ॥९॥ ऐकतां विंध्याद्रीची वाणी। हांसिन्नला नारदमुनी। यासीं गर्व बहुसाल मनीं। समर्थपणीं वर्तत ॥१०॥ रत्नें प्रवाळनिकर। नाना धातु विचित्र। जळस्रोत परिकर। औषधि विचित्र पर्वतीं ॥११॥ चंपक चंदन मांदार। कल्पतरूंचें आगर। चिंतामणि सविस्तर। पर्वतीं अपार पसरले ॥१२॥ खिल्लारें कामधेनूंचीं। पर्वतीं हिंडती सैरची। तेणें दृष्टि फिरली बुद्धीची। वाढला उंची अति गर्वे ॥१३॥ जेथें धनधान्यसमृद्धी। तेथें विषयीं घोर बुद्धी। विषाहूनि

---

शब्दार्थ : १. श्रेष्ठ, २. ब्रह्मबोधाने, ३. सर्व इंद्रियांना ब्रह्मबोध झाला आहे असा.

विषयबुद्धी। अधिक त्रिशुद्धी घातक ॥१४॥ विष खादलिया एकदां मरे। विषयें कोट्यानुकोटी फेरे। भोगिताती योनिद्वारें। परी माघारें न सरती ॥१५॥ ऐसी विषयमद्यजाती। ते चढलीसे पर्वतीं। याची झडे गर्वस्थिती। तैसी युक्ती करावी ॥१६॥ ऐसें नेमूनि मानसीं। स्तवूं आदरिलें मेरूसी। समृद्धि सांगों तुझिया ऐसी। अधिक त्यासीं कोटिगुणें ॥१७॥ सप्तऋषि त्यासीं जाण। नित्य करिती प्रदक्षिण। वैकुंठकैलासाहूनि गहन। संपत्ति जाण मेरूची ॥१८॥ याचकांचे इच्छेवरी। मेरूच्या दातृत्वाची थोरी। पार नाहीं त्याचे गंभीरी। सुरासुरीं वानिजे ॥१९॥ ब्रह्मा विष्णु उमाकांत। त्याची आज्ञा शिरीं वाहत। इंद्र त्याचा शरणागत। समृद्धि मागत तयापासीं ॥२०॥ या ब्रह्मांडामाझारीं। मेरुपर्वतासम सरी[1]। सभाग्य नाहीं चराचरीं। अगाध थोरी मेरूची ॥२१॥ ऐसें सांगूनि नारदमुनीं। स्वयें निघाला तत्क्षणीं। ब्रह्मवीणा झणत्कारूनी। स्वेच्छागमनीं चमकला ॥२२॥ ऐकतां नारदाची मात। विंध्याद्रि झाला चिंताक्रांत। चढला अभिमान पोटांत। वाढला अद्‌भुत आकाशीं ॥२३॥ गति खुंटलो रविशशी। ग्रहगणें झालीं पिशीं। नक्षत्रांची गति कायसी। कासाविसी सुरसिद्धां ॥२४॥ खुंटलें सकळ दिनमान। गडद पडलें दारुण। खुंटलें याजन[2] यजन। सत्कर्म जाण खुंटलें ॥२५॥ क्षुधा पीडिले सुरवर। याग खुंटले समग्र। कासावीस ऋषीश्वर। कर्ममात्र स्फुरेना ॥२६॥ खुंटली दिनमानाची गती। उदय अस्त न कळे सर्वार्थीं। सकळ लोक तळमळती। कांही युक्ती स्फुरेना ॥२७॥ पडिला घोर अहंकार। खुंटला सकळ व्यवहार। ब्रह्मा हरि हर इंद्र चंद्र। चिंतातुर पैं झालें ॥२८॥ मिळोनी सकळ समुदायेंसीं। ठाकोनि आले काशीपुरासी। लोटांगणीं अति प्रीतीसीं। चंद्रचूडासी[3] भेटले ॥२९॥ करोनियां विचित्र स्तवन। सांगते झाले विवंचन। गिरी वाढोन असाधारण। केलें रोधन सकळांसी ॥३०॥ खुंटली सकळांची गती। उदय अस्त न दिसती। सर्वथा न कळे दिनराती। कर्म सर्वार्थीं राहिले ॥३१॥ राहिली यागादि क्रिया। लंघन पडिलें सुरवर्या[4]। वेगी करोनि कुढाविया[5]। स्वामिया प्राण संरक्षीं ॥३२॥ ऐसी करितां विनवण। मजही चिंता दारुण। वर्तली पैं असाधारण। युक्ति हो जाण खुंटली ॥३३॥ तंव नारद पातला तेथ। तेणें सांगितलें सकळ वृत्त। ऐकोनि मेरूचें आचरित। गर्वे पर्वत वाढला ॥३४॥ त्या गर्वपरिहारासीं। प्रार्थोनियां अगस्तीसीं। पाठवितां दक्षिणेसीं। तो पर्वतासी दंडील ॥३५॥ मार्ग मागोनियां पर्वता। त्यासी घालील पालथा। तेणें निर्मुक्ति समस्तां। शशिभास्वतां सुखें गमन ॥३६॥ गर्वहरण पर्वतासीं। निर्मुक्ति सकळ कर्मासी। संपादन यागादिकांसी। तृप्ति सकळांसी होईल ॥३७॥ ऐसें नारदें सांगतां। सकळांचिया मानलें चित्ता। बुद्धी योजिली तत्वतां। आनंद चित्ता पैं झाला ॥३८॥ एका कार्यें दोनी अर्थ। संपादती इत्थंभूत। दंडकारण्य समस्त। अगस्ती निश्चित वसवील ॥३९॥ ऐसा करोनि निर्धार। विनविला तो मुनिवर। स्तुति करोनि विचित्र। प्रसन्नवक्त्र पैं केला ॥४०॥ प्रसन्न करोनियां ऋषी। विनविते झाले प्रीतीसीं। तुम्हीं जावें दक्षिणेसीं। दंडकारण्यासीं वसवावया ॥४१॥ दंडकाच्या शापें दारुण। उद्वस[6] झालें तें वन। राक्षस येवोनि आपण। केलें रोधन वनाचें ॥४२॥ राक्षसांच्या भयें पूर्ण। राहिलें दक्षिणतीर्थाटन। तुम्हीं तेथें केल्या गमन। सुखें तें वन वसेल ॥४३॥ जेथें राहिले साधुसंत। तें स्थळ अति पुनीत। भूत प्रेत पिशाच तेथ। राक्षस समस्त पळतील ॥४४॥ दंडावया राक्षसांसी। परब्रह्मअनुग्रह तुम्हांसी। देखतांचि तयांसी। प्राणांत त्यांसी सहजचि ॥४५॥ जेथें ब्रह्मनिष्ठ राहती। तेथें सजीव निर्जीवपंक्ती। त्यासीं अनायासें नित्य मुक्ती। सत्संगतीपासाव ॥४६॥ राक्षसांची क्रूरता।

शब्दार्थ : १. तुलनेला, २. यज्ञ करविणे, ३. शंकराला, ४. इंद्राला, ५. रक्षणाला, ६. ओसाड.

आणि भूतांची विषमता। दृष्टी पडतां साधुसंतां। नित्यमुक्तता जडजीवां।।४७।। ऐसें साधूंचें सामर्थ्य। ते स्वयें तुम्ही वसतां तेथ। दंडकारण्य अत्यद्भुत। नित्यमुक्त होईल।।४८।। राक्षस उद्धारती समस्त। पांथिकां मार्ग निर्मुक्त। तीर्थवासी तीर्थ पावत। उद्धार समस्त जड जीवां।।४९।।

काशी सोडावी लागणार म्हणून अगस्तींना दुःखः ऐसे सांगतां तयासी। मूर्च्छा आली अगस्तीसीं। भूमीं आदळला वेगेंसीं। अति दुःखासी पावला।।५०।। निर्दैव निजलिया पाहें। स्वप्नीं सांपडे धनलोहे[1]। जागा होतां हातींचें जाये। तैसें पाहें मज झालें।।५१।। कोणें भाग्यें अनायासीं। मज प्राप्त झाली काशी। सर्वेचि ओढवल्या पापराशी। दुःख कोणासी मी सांगों।।५२।। न लागतां तपसायास। योग याग व्रत उपवास। करितां वाराणसीवास। मोक्षसुखास पाविजे।।५३।। पात न करितां पडणीं। कर्वत न भेदितां मूर्ध्नीं। वास करितां महाश्मशानी। सुखसमाधानीं महामोक्ष।।५४।। अंध पंगु मुकें पाहीं। ज्यांसी साधनाचा गंध नाहीं। काशीवास करितां तिहीं। सुखें पाहीं निजमोक्ष।।५५।। ऐसें वाराणसीचें महिमान। म्हणोनि विश्वास धरोन। राहिलों होतों वास करून। तंव महाविघ्न ओढवलें।।५६।। मज सांडितां काशीभुवन। तेचि काळीं देहपतन। विश्वेश्वरदर्शनावांचून। न वांचती प्राण सर्वथा।।५७।। नित्य मणिकर्णिकचें स्नान। विश्वेश्वराचें दर्शन। सांडूनि माझें न निघे मन। क्षणें प्राण जातील।।५८।। म्हणोनि चालिलें स्फुंदन। कंठीं बाष्प[2] दाटलें पूर्ण। नेत्रीं चालिलें जीवन। तेणें दृश्यभान लोपलें।।५९।। वाचा झाली सद्गदित। प्राण पांगुळला जेथींचा तेथ। टकमकीत समस्त। जेथींच्या तेथ पैं झाले।।६०।। कैंचा ओढवला रावण। कैंचे रोधिलें अरण्य। काशीत्यागाचें वचन। तें दारुण विघ्न मजकडे।।६१।। काशीत्यागाची वार्ता। ऐकतां अगस्तीच्या चित्ता। झाली परमावस्था। प्राण तत्वतां जाऊं पाहे।।६२।। ते काळीं सुरवर। झाले सकळ चिंतातुर। अळुमाळ[3] न स्फुरे विचार। कार्य समग्र राहिलें।।६३।। विंध्याद्रि नावरे कांहीं। रविचंद्रां गति नाहीं। दंडकारण्याचे ठायीं। गमन तेंही पैं नव्हे।।६४।। न सांडवे क्षेत्र काशी। वियोग न साहवे विश्वेशाशीं। त्यागोनि जातां मणिकर्णिकेसी। दुःख अगस्तीसीं अनिवार।।६५।। त्या काळीं म्यां आपण। उभय संकट जाणोन। अगस्तीसीं विनवण। प्रीतिकरोन पैं केली।।६६।।

श्रीशंकरांकडून अगस्तींची प्रार्थना : ऐक अगस्ति मुनिनाथा। चिंता न करावी सर्वथा। तुझ्या वियोगाची व्यथा। सकळ तत्वतां निरसेल।।६७।। विंध्याद्रि वाढला बहुवस। निरोधिलें उदयास्तास। सत्कर्म तेणें पडिलें ओस। याग अशेष राहिले।।६८।। तेणें पीडिले सुरगण। क्षुधेनें जाऊं पाहे प्राण। कांहीं न चले विंदान। म्हणोनि विनवण करूं आले।।६९।। निग्रहावया विंध्याद्रीसीं। वसवावया दंडकारण्यासी। सामर्थ्य नाहीं आणिकांसी। शरण तुम्हांसी ते आले।।७०।। तरी शरणागतां शरण्य। साचार तुम्ही साधु सज्जन। सेवितां तुमचे श्रीचरण। भवबंधन लागेना।।७१।। तेथें इतर संकट बापुडें। केंवी राहे सत्संगापुढें। तुमचे कृपादृष्टीपुढें भवसांकडें[4] राहेना।।७२।। इतरीं दंडावें पर्वतासी। तरी स्वधर्मनिष्ठ अहर्निशीं। सत्ता न चले स्वधर्मनिष्ठासीं। युक्तीनें त्यासीं आवरावें।।७३।। धर्मिष्ठाचा निश्चियो जाणा। विश्वासावें साधुसज्जनां। सर्वस्व अर्पितां सज्जनां। निजमनाचा उल्लास।।७४।। याकारणें स्वामी आपण। सत्वर करोनियां गमन। पर्वतांचें आकर्षण। युक्ति करोन साधावें।।७५।। मार्ग मागोनि तयासीं। नमन करावें दक्षिणेसीं। जातां आज्ञा करावी ऐसी। पुनरागमनेंसीं ऊठिजे।।७६।। दक्षिणे करोनि गमन। वसवावें दंडकारण्य। रुद्रगयादि तीर्थदर्शन। दिनांसीं आपण करावें।।७७।।

शब्दार्थ : १. द्रव्याचा हांडा, २. गहिंवर, ३. किंचितही, ४. जन्ममरणाचे संकट.

वाराणसीच्या वियोगासीं। सर्वथा न धरावें मानसीं । ब्रह्मरूप आचरतां कर्मासी। मुक्ति तुम्हांसी ओळंगती॥७८॥ कोण तें म्हणसी ब्रह्म। ब्रह्मरूप ते कैसे कर्म। मुक्तीचे तें कैसे वर्म। ऐक ऐक सुगम सांगेन॥७९॥

शांतं ब्रह्मवपुर्भूत्वा कर्म ब्रह्ममयं कुरु। ब्रह्मार्पणसमाचारो ब्रह्मीभवसि तत्क्षणात्॥१॥

ब्रह्मस्वरूपाचे विवेचन : काम क्रोध सलोभता। तेथें नि:शेष नातळे चित्ता। त्या नांव ब्रह्मशांतता। जाण सर्वथा ऋषिवरा॥८०॥ कामक्रोधलोभरहित। सर्व काळीं सर्वगत। अंतर्बाह्य सदोदित। असे व्याप्त आनखाग[1]॥८१॥ भेदोनि सप्तपाताळांसी। वैकुंठादिक कैलासासी। रिता अवकाश नाहीं ज्यासी। शांतब्रह्म त्यासी पैं म्हणती॥८२॥ तयें व्यापकीं होवोनि निमग्न। आचरतां सकळ कर्माचरण। सर्वथा न बाधी मानाभिमान। कर्मबंधन तेथें कैंचें॥८३॥ मुख्य बद्धतेचें आयतन। अहंता आणि ममता जाण। असावें जरी परिच्छिन्न[2]। तरी बाधा पूर्ण तयांची॥८४॥ जेथें परिच्छिन्नासी नाहीं ठावो। तेथें अहंममता समूळ वावो। बद्धतेचा अभावो। विरमे पहा हो मुक्तिही॥८५॥ जेथें बद्धता समूळ नाहीं। तेथें मुक्तता कैंची कायी। ब्रह्मरूप कर्माच्या ठायीं। ऐसा लाभ पाहीं साधका॥८६॥ जेंवी सागराच्या लहरी। अद्वैतें क्रीडती सागरीं। स्फुरण नाहीं तिळभरी। ब्रह्मामाझारी कर्म तैसें॥८७॥ जेंवी रत्नांचें रत्नकीळ[3]। रत्नापुढें अति चपळ। अद्वैतशोभा अति प्रबळ। ब्रह्मीं केवळ कर्म तैसें॥८८॥ येणें अनुसंधानें तत्वतां। सकळ कर्मीं वर्तता। स्फुरण नाहीं सर्वथा। ब्रह्मरूपता सहजचि॥८९॥ देहांती काशीचे ठायीं। जें मी उपदेशीं लवलाहीं। तये निष्ठेचे ठायीं। अनायासें पाहीं निजप्राप्ति॥९०॥ काशीक्षेत्र एकदेशी। ब्रह्म सर्वगत सर्वदेशीं। तूं स्वयें तद्रूपच आहेसी। संदेह मानसीं न धरावा॥९१॥

अगस्तींचा प्रश्न: ऐसें ऐकतां माझें वचन। न मानीं अगस्तीचें मन। अति युक्तीं केला तेणें प्रश्न। ऐक सावधान सांगेन॥९२॥ ऐक स्वामी विश्वनाथा। जे सांगितली ब्रह्मसंस्था। तेणें अनुसंधानें असतां। मुक्ति अंकिता पैं होती॥९३॥ हें मी जाणतो यथार्थता। तेथें संदेह नाहीं सर्वथा। परंतु ऐसिये स्थितीचा वक्ता। अधिक तत्वतां त्याहूनि तो॥९४॥ ज्याचेनि वचनें ब्रह्मस्थिती। काय सांगों त्याची महती। वेदां न वर्णवे निश्चितीं। वेडावती शास्त्रार्थ॥९५॥ ऐकतां त्याच्या वियोगासी। स्वहितीं कळवळा ज्यासीं। प्राणांत हों पाहे त्यासीं। ते वृत्तीसीं ठाव कैंचा॥९६॥ चहूं वाचांसीं उपरम। मनासीं कल्पितां दुर्गम। तये वस्तूची सुगम। मूस परम ओतली॥९७॥ जे असे सर्वदा अगोचर । ते असतां इंद्रियगोचर। सांडूनि जाय तो पामर। संसारपार केंवी पावे॥९८॥

अगस्तीला शंकरांचा वियोग असह्य : म्हणोनियां स्वामिनाथा। तुझा वियोग तत्वतां। मज न सहावे सर्वथा। बहुत आतां काय सांगूं॥९९॥ याउपरी विनवितां। क्षोभ स्वामीचिया चित्ता। येईल पैं याकरितां। युक्ति सर्वथा योजेना॥१००॥ जैसें मानेल स्वामीसी। तैसी आज्ञा करीं आम्हांसी। म्हणोनि लागला चरणांसी। उकसाबुकसीं स्फुंदत॥१॥ संकट पडिलें सर्वांसी। अगस्ति न सांडी वाराणसी। कोण निग्रही[4] विंध्याद्रीसी। उदयअस्तांसी गति कैंची॥२॥ ते काळीं मी आपण। बहुतां युक्ती करून। अगस्तीसीं समाधान। दिधलें जाण अति प्रीतीं॥३॥ तुज शिवदर्शनाची आवडी। तद्विषयीं धडफुडी। युक्ति सांगेन चोखडी। ऐक निर्वडीं बुद्धि त्याची॥४॥

वियोग होऊ नये म्हणून शंकरांनी सुचविलेली युक्ती : श्रीरामदर्शनीं अवस्था। अत्यंत आहे माझ्या चित्ता। उभयकार्यसंस्था। साधे तत्वतां जाण पैं॥५॥ ऐसी सांगेन मी युक्ती। उभयार्थ

शब्दार्थ : १. पायांच्या नखांपासून मस्तकापर्यंत, २. एकदेशी, ३. रत्नांची प्रभा, ४. आवरील.

संपादती। सुरवरांची उगवे गुंती[१]। अवस्थानिवृत्ती सत्यत्वें ॥६॥ पूर्ण ब्रह्म सदोदित। दाशरथी श्रीरघुनाथ। जनस्थान करोनि मुक्त। रावणघात करूं येईल ॥७॥ त्रिशिरा आणि खर दूषण। यांसीं करोनि निर्दळण। दक्षिणे येवोनि रघुनंदन। समुद्रा पालाण पर्वतीं ॥८॥ निशाचरां करोनि घात। लंकेशाचा निःपात। सुरवरांसी बंदिमुक्ति। क्षणें रघुनाथ करील ॥९॥ त्रैलोक्यासीं विजयोत्सवो। स्वयें परतेल रामरावो। तेणें काळें आम्ही पहाहो। येवो स्वयमेव दर्शना ॥११०॥

काशीविरहमापन्नो मा भैस्त्वं कलशोद्भव। भवदर्थे करिष्यामि आवासं पूर्वसागरे ॥२॥

"रामदर्शनार्थ स्वतः आपण येऊ तेव्हा तुला दर्शन होईल": कलशोद्भवा[२] मुनिवरा[३]। काशीविरहें विरहातुरा। तुजलागीं पूर्व सागरा। वास निर्धारा करीन मी ॥११॥ सकळांचें पूर्व श्रीरघुनाथ। दक्षिणे येईल रावणवधार्थ। म्हणोनियां विश्वनाथ। पूर्व म्हणत तिये दिशे ॥१२॥ श्रीरामदर्शनाचे मिषें। मी येईन तिये दिशे। तुवां जावें सावकाशें। चिंता मानसी न करवी ॥१३॥

श्रीरामनामाक्षरमंत्रबीजं जाप्यं मदीयं परमामृतं मे ।
समुद्रजातं गरलं वृथा कृतं ध्येयं मदीयं स तु रामचंद्रः ॥३॥

शिवकृत नाममहिमा : श्रीरामनामावांचून पाही। मज आन प्रिय नाहीं। तुज सांगेन मी तेंही। सावध पाहीं परियेसी ॥१४॥ रामनाम युग्म अक्षर। वाचेसीं येतां एकवार। सर्वांगीं अमृताचा पूर। वेगवत्तर चालिला ॥१५॥ त्या अमृताचेनि तेजें देख। करपोनि गेलें व्याळविख[२]। पन्नग[३] झालें निर्विख। अळंकारें देख बाधितीना ॥१६॥ अल्प पन्नगाची गरळ। त्याहूनि विशेष हळाहळ। समुद्रमंथनीं तत्काळ। उठलें जगतीतळ जाळीत ॥१७॥ पीडित सकळ सुरगण। यक्ष किन्नर सिद्ध चारण। ऋषि आदि दीनजन। भूमंडळ जाण जाळित ॥१८॥ तेणें काळें म्यां आपण। श्रीरामनामाच्या बळें जाण। न लागतां अर्ध क्षण। कंठी जाण धरियेलें ॥१९॥ अल्पही त्याची बाधा नाहीं। त्याहूनि अपूर्व आणीक कांहीं। प्रळयानळातें गिळीं लवलाहीं। प्रतापें पाहीं रामाच्या ॥१२०॥ प्रळयकाळीं प्रळयानळ। उठतां जाळी जगतीतळ। तितुकाहीं प्राशितां सकळ। मज अळुमाळ बाधीना ॥२१॥ ऐसा श्रीरामनामप्रताप। जेणें विषहळांहळताप। भस्म झाला आपोआप। तें परम जाप्य[४] जाण माझें ॥२२॥ वदनीं जप श्रीराम पूर्ण। मनीं रामाचें निजध्यान। निःसीम इंद्रियाचरण। रघुनंदननिजसेवा ॥२३॥ तो मूर्तिमंत रघुनंदन। भूमंडळीं अवतरेल पूर्ण। त्याचें घ्यावया दर्शन। अवश्य जाण येईन मी ॥२४॥ न घेतां श्रीरामदर्शन। भूमिभार वृथा जीवन। यालागीं मी आपण। येईन जाण भेटीसीं ॥२५॥ तुम्हां आम्हां दर्शन। तेणें काळें होईल जाण। सकळ भाग्याचें मंडन। आर्तनिरसन[५] श्रीरामें ॥२६॥ तंववरी जनस्थान जाण। तुम्हीं वसवावें आपण। देवकार्यसंपादन। पर्वतरोधन करावें ॥२७॥ येणें लोभें अगस्तीसी। पाठविलें दक्षिणेसीं। निग्रहोनि पर्वतासी। जनस्थानासी वसविलें ॥२८॥ ऐसें सांगतां बहुतां रीतीं। वियोग न साहावे ऋषीप्रती। कोणे काळें रघुपती। वनाप्रती येईल ॥२९॥ कधी होईल सेतुबंधन। कैं मरेल तो रावण। कैं सुटती सुरगण। रघुनंदन भेटेल कैं ॥१३०॥ ग्लानी भाकितां दारुण। न करी दक्षिणे गमन। ते काळीं मागुतेन। त्यासीं आश्वासन दीधलें ॥३१॥ न करितां रावणवधासी। पहिलेंचि रामदर्शनासी। मी येईन निश्चियेसीं। म्हणोनि त्यासी भाक[६] दीधली ॥३२॥ येणेंचि कार्यें तत्वता। तूं न सुटसी सर्वथा। उत्तरोत्तर सुरकार्यार्था। असे स्वस्थता तुझेनि हातें ॥३३॥ पुढील कल्प जो भावी। तुज तेथें व्यासपदवी। अनायासें निजस्वभावीं। निजगौरवीं होईल ॥३४॥ ऐसें शांतवोनि तयासी। पाठविलें दक्षिणेसी। निरोधोनि पर्वतासी। सत्कर्मासीं

शब्दार्थ : १. संकट, २. सर्पविष, ३. जप करण्यास योग्य, ४. पीडितांचे संकटनिवारण, ५. वचन, ६. शपथ.

निर्मुक्ति ।।३५।। हें कार्य साधलें तें गौण। पुढें महत्कृत्य दारुण। येवोनियां रघुनंदन। दशानन निवटील ।।३६।। ऐसा केला इत्यर्थ। तो फळासी आला सिद्ध्यर्थ। राम येवोनि दक्षिणेआंत। केलें निर्मुक्त जनस्थान ।।३७।। निवटून राक्षसगण। द्विजां दिधलें जनस्थान। संपविलें सेतुबंधन। आतां दशानन निवटेल ।।३८।।

श्रीशंकरांनी रामदर्शनासाठी स्वतःच जाण्याचा बेत मारुतीला सांगितला : याकारणें परियेसीं। लिंगरूपें रामदर्शनासी। मीच येतों श्रीरामापासीं। ऐसे हनुमंतासी सांगितलें ।।३९।। येणें रूपें भेटीसी। सांडोनि येतां वाराणसी। आकांत होईल सकळांसीं। कोणी नगरीसीं न राहे ।।१४०।। ऐसें शंकराचें वचन। ऐकतां वायुनंदन। सुखें झाला सुखैकघन। आनंद पूर्ण उथळला[१] ।।४१।। लागोनियां शिवचरणां। विनविता झाला जाणा। शीघ्र द्यावें आज्ञापना। श्रीराम-दर्शनालागोनी ।।४२।।

आत्मतेजयुक्त असे स्वतःचे लिंग निर्माण करून शंकरांनी मारुतीला दिले: ऐसे हनुमंताचें विनवण। ऐकतांच शंकरें पूर्ण। निजात्मतेज आकर्षून। लिंग निर्माण पैं केलें ।।४३।। देतां हनुमंताचे हातीं। आनंद दाटला चित्तीं। वानरा आत्मलिंगप्राप्ती। अगाध ख्याती रामाची ।।४४।। तरी नवल नव्हे येथ। जड जाड्याचा सांगात। धरितांचि त्वरित। मस्तकीं बैसत महंताच्या ।।४५।।

उत्तमानां प्रसंगेन साधवो यांति गौरवम् । पुष्पमालाप्रसंगेन सूत्रं शिरसि धार्यते ।।४।।

संगतीचा परिणामः तेहीविषींचा वृत्तांत। अति जड सूत्रतंत। जडा सुमनाचा सांगात। धरितां चढत राजमुकुटीं ।।४६।। सुमनमाळा कंठीं शिरीं। श्रीमंत मिरविती हारीं। तेंवी आम्ही रामसेवेकरीं। वंद्य चराचरीं पैं झालों ।।४७।। विचारितां दोनी जडें। संगे श्रीमंतमुकुटीं चढे। चढोनि मिरविती कोडें। निजनिवाडें[२] निजभक्तीं ।।४८।। तैसा नव्हे रघुनंदन। चिदानंदैकघन पूर्ण। त्याचे सेवितां श्रीचरण। दुष्प्राप्य कोण आम्हांसी ।।४९।। ऐसें श्रीरामभजनें तत्वतां। स्वयें मानोनि कृतार्थता। लिंग घेवोनि होय निघता। श्रीरामदर्शनालागोनी ।।१५०।।

श्रीशंकरांना नमन करून मारुती श्रीरामांकडे निघाला : विश्वनाथा करोनि नमन। नमिले समस्त शिवगण। स्वयें आज्ञा पुसोन। केलें उड्डाण रामनामें ।।५१।। सबाह्य स्मरोनि रघुनंदन। भुभुःकार केला दारुण। तेणें दणाणिलें त्रिभुवन। कुळाचळ पूर्ण गडाडिले ।।५२।। दिवि[३] भुवि[४] अंतररिक्ष उमोप। जीवमात्रां सुटला कंप। देखतां मारुतिप्रताप। शिव अमूप गजबजिला ।।५३। शिवगणें कांपिन्नलीं। उमा शंकरा मिठी घाली। सकळ सृष्टि गजबजिली। पडली दांतखिळी कृतांता ।।५४।। उड्डानसमयीं हनुमान वीर। देखिला अतिशयें उग्र। नेत्र जैसे खदिरांगार[५]। माथां पुच्छाग्र वाहिलें ।।५५।। पिंजारल्या रोमावळी। बुबुळें गेली भंवयातळीं। दिसे विक्राळ दांताळी। जैसा प्रळयकाळीं महारुद्र ।।५६।। देखतां हनुमंताचें चिन्ह। अति भयभीत शिवगण। येरें स्मरोनि रघुनंदन। केलें उड्डाण आकाशीं ।।५७।। संधान मात्र श्रीरामबाण। क्षणें आक्रमी गगन। तैसा निघाला वायुनंदन। लाजवी उड्डाण गरुडाचें ।।५८।। अति विस्मय सदाशिवासीं। उमा विस्मिता होय मानसीं। परमाश्चर्य शिवगणांसी। पवनात्मजासी देखोनी ।।५९।। तटस्थ झाली काशीपुरी। जयजयकार करोनी खेचरीं। पुष्पवृष्टी कपीचे शिरीं। केली गजरीं अति प्रीतीं ।।१६०।। स्वर्गीं वंदिती सुरगण। श्रीरामभक्ताची आंगवण। जें चरित्र केलें अति पावन। ख्याति गहन त्रिलोकीं ।।६१।। एका जनार्दना शरण। आत्मलिंग स्वयें आणून। हनुमंतें नमिला रघुनंदन। श्रोते अवधान देत स्वयें ।।१६२।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां आत्मलिंगानयनं नाम पंचसप्ततितमोऽध्यायः ।।७५।। ओंव्या ।। १६२।। श्लोक ।।४।। एवं ।।१६६।।

---

शब्दार्थ : १. उचंबळला, २. निश्चयेकरून, ३. स्वर्गी, ४. पृथ्वीवर, ५. खैराचे निखारे.

# अध्याय शहात्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## श्रीरामेश्वरमहिमावर्णन

**मारुतीस परतण्यास वेळ लागल्याने श्रीराम सचिंत :** विश्वेश्वरदत्त लिंग। हनुमान घेवोनि सवेग। उड्डान केलें अति चांग। गगन सांग आक्रमिलें ॥१॥ येरीकडे रघुनंदन। झाला अत्यंत उद्विग्न। कां पां नयेचि वायुनंदन[१]। काय विघ्न पडिलेंसे ॥२॥ उपवासी वानरवीर। खेदक्षीण क्षुधातुर। आम्हांसीं न घेतां फळाहार। वानर आहार न सेविती ॥३॥ बापुडे हे गोळांगूळ। आहारेवीण झाले विकळ। गात्रें जाहलीं बेंबळ[२]। भ्रमती डोळे गरगरां ॥४॥ यांसी आहार न देतां। सकळां होईल प्राणांतव्यथा। रामाचा नेम आम्हांभोंवता। वानरां समस्तां मारिलें क्षुधा ॥५॥ ऐसी विस्तरेल ख्याती। जगीं होईल अपकीर्ती। श्रीरामसेवा सुखार्थी। दुःखप्राप्ती तेथें झालीं ॥६॥ सकळ निरसावया विघ्न। सेवावा श्रीरघुनंदन। तेणेंचि मांडिलें निर्वाण[३]। क्षुधेनें प्राण जावूं पाहे ॥७॥ भजनाभिमान वाढवितां देख। दुरपवाद[४] बोलती लोक। सेवितां श्रीरघुकुळटिळक। जीवें निःशेख मारिले ॥८॥ जो आग्रहे गुंतला स्वयें। तो अन्यातें सोडील काये। लहान थोर लोक पाहें। अपवाद स्वयें बोलती ॥९॥ आणीक सिद्धांत नव्हे ऐसा। एकदेशीं विश्वेशा। भावूं नये गा सहसा। भजनठसा हा नव्हे ॥१०॥ जो सर्वगत सनातन। ज्यासीं विश्वात्मा हें अभिधान। तो प्रतिमेच्या ठायीं पूर्ण। भावितां जाण क्षोभेल ॥११॥ शिवपूजेचें महिमान। सद्गुरुवसिष्ठमुखें जाण। म्यां ऐकिलें आपण। विश्वमूर्ति पूर्ण शंकर ॥१२॥ त्याचें पूजेचें आयतन[५]। प्राणिमात्रां सुख जाण। म्यांचि ऐकिलें आपण। स्वशक्तिकरोन[६] सर्वथा ॥१३॥ ऐसा असतां निर्धार। क्षुधा पीडतां वानर। स्वयें क्षोभेल शंकर। भजन साचार हें नव्हे ॥१४॥

**येन केनाप्युपायेन यस्य कस्यापि देहिनः। सन्तोषं जनयेत्प्राज्ञस्तदेवेश्वरपूजनम् ॥१॥**

**सर्व भूतसृष्टीला संतोष देणें हीच ईश्वरपूजा :** ज्ञानाचें मुख्य लक्षण। सर्वां भूतीं श्रीभगवान। स्वयें सेवावा अनवच्छिन्न[७]। श्रुतिवचन गर्जत ॥१५॥ यथासामर्थ्ये यथावित्ते। चित्तें भावार्थे जीवितें। सुख द्यावें प्राणिमात्रातें। हेंचि निश्चितें निजभजन ॥१६॥ भलते याती भलते योनी। भलतेनी प्रकारेंकरोनि। सुख प्राणिमात्रालागूनी। द्यावें अनुदिनीं हेंचि भजन ॥१७॥ मेळवोनि षोडशोपचार। प्रतिमा पूजितां साचार। स्वयें सुखावेना शंकर। जेंवी चराचर पूजिलिया ॥१८॥ विश्वमूर्ति विष्वक्सेन। गर्जताहे श्रुति पुराण। तेथें प्रतिमेचें पूजन। तें गौण जाण श्रुतिवाक्यें ॥१९॥ यालागीं विश्वमूर्ती। शंकर पूजावा सर्वां भूतीं। तेथें वानरांची उपेक्षा चित्तीं। करितां निश्चितीं अधर्म ॥२०॥ मजलागीं आर्तभूतें[८]। चित्तें वित्तें जीवितें। तीं सांडोनि तळमळितें। आमचीं व्रतें तीं किती ॥२१॥ मुख्य पूजेचें आयतन। प्राणिमात्रा सुखदान। बाह्य विधीचें प्रतिपालन। प्रतिमा जाण लौकिकी ॥२२॥

**वानरांना तृप्त करण्यासाठी राम वाळूचे लिंग करतात :** ऐसा करोनि निर्धार। तृप्त करावया वानर। सरसावला रघुवीर। विधी साचार लक्षोनी ॥२३॥ लिंगपूजेवांचून जाण। करितां नये फळभोजन। लौकिक वाढला संपूर्ण। लिंग निर्माण करूं येथें ॥२४॥ समुद्रतीरीं वाळुवेचें। लिंग निर्माण करोनि साचें। पूजन करानि तयाचें। करूं वानरांचें क्षुधाहरण ॥२५॥ म्हणोनियां

शब्दार्थ : १. मारुतीला, २. निर्जीव, कमजोर, ३. नाश, ४. दूषण, ५. स्थान, ६. एकाग्रचित्तानें, ७. सतत, ८. पीडित.

श्रीरामचंद्र। वाळुकालिंग सत्वर। करोनियां पूजोपचार। तेथें रघुवीर प्रतिष्ठी॥२६॥ प्रतिमेसीं आवाहन। स्वयें करितां रघुनंदन। तंव आश्चर्य वर्तलें गहन। सावधान अवधारा॥२७॥ जाणवलें शंकरासी। तो खळबळिला मानसीं। क्षोभ वाटेल राघवासी। आतां जिण्यासीं ठाव कैंचा॥२८॥ मारुतीसीं बोलतां। विलंब लागला सर्वथा। तंव इकडे श्रीरघुनाथा। दर्शनार्था वचलों[1]॥२९॥ सांडोनियां निजानुसंधान। वाग्व्यापार[2] करितां पूर्ण। निजात्मा जो अंतरज्ञ। तो सर्वथा जाण दुरावे॥३०॥ वृथा करितां तोंडपिटी[3]। कायसी साधनांची गोष्टी। तैं साध्यासी कैंची भेटी। वृथा वटवटी नागवण॥३१॥ साध्य आकळे संपूर्ण। तंव सज्जनासी करावा प्रश्न। पावलिया निजखूण। वाग्व्यापार जाण न करावा॥३२॥ आणिकाची कथा कोण। माझी बुद्धि ठकली पूर्ण। भेटतांचि वायुनंदन। घ्यावें दर्शन उठाउठीं॥३३॥ कायसी पर्वताची कथा। सांगावया गुंतलों मारुता। तंव क्षोभ आला रघुनाथा। उपेक्षा तत्वतां केली माझी॥३४॥

श्रीशंकरांचा त्या वाळूच्या लिंगांत प्रवेश: प्रसन्न व्हावया रघुवीर। काय करणें विचार। वाळुकालिंग व्यवहारमात्र। केलें सत्वर श्रीरामें॥३५॥ तेथें प्रवेशोनि आपण। घ्यावें श्रीरामदर्शन। इतुकेन विकोपाचें विसर्जन। सहजचि जाण होईल॥३६॥ झालिया साक्षात्कार। मग कोपासी कैंचा थार। आणि श्रीरामाचें चरित्र। तें वंद्य साचार आम्हांसी॥३७॥ लीलेनें अंगीकारी श्रीरघुनाथ। तें आम्हां वंद्य यथार्थ। म्हणोनि वाळुकालिंगाआंत। स्वयें तेथ आपण प्रवेशे॥३८॥ ऐसा करोनि निर्धार। मागें सांडूनि हनुमान वीर। स्वयें येवोनि शंकर। प्रवेश सत्वर लिंगामाजी॥३९॥ श्रीरामें करोनि प्रतिष्ठापन। स्वयें केलें फळभोजन। तृप्त केले वानरगण। क्षुधा संपूर्ण निरसली॥४०॥ तृप्त झाले वानर। करीत रामनामें भुभु:कार। बाप कृपाळु रघुवीर। क्षुधा सत्वर निरसिली॥४१॥ निजतेजें श्रीशंकर। पुढें आला वेगवत्तर। मागें उरली प्रतिमा मात्र। आला कपींद्र तेणेंसीं॥४२॥ तंव आश्चर्य देखिलें तेथें। लिंग प्रतिष्ठोनि रघुनाथें। संपादिलें फळाहारातें। तृप्त समस्तें वानर॥४३॥

नंतर मारुती येऊन पोचला. सागरतीरावर वालुका लिंग पाहून मारुती उद्विग्न व त्याचा क्षोभ: मज पाठवोनि काशीतें। लिंग आणविलें रघुनाथें। शेखीं[3] वाळूचें प्रतिष्ठिलें येथें। निजकार्यातें संपादिलें॥४४॥ आम्हीं कष्टें कार्य साधित। श्रीराम करी वाताहत। तरी आमचें काय जीवित। वृथा निंदित लौकिकीं॥४५॥ आतां मी ऐसें करीन। श्रीरामें केलें लिंगस्थापन। तें उपडोनियां सांडीन। प्रतिष्ठीत निजलिंग॥४६॥ म्हणोनि अभिमानला मारुती। पुच्छें कवळोनि लिंगाप्रती। लिंग उपडावया निश्चिती। साटोप मारुती मांडिला॥४७॥

वाळूचें लिंग उखडण्यात मारुतीला अपयश : व्यर्थ करोनि श्रीरामाज्ञेसी। निजाभिमानें लिंगासी। उत्थापूं[4] पाहे आवेशीं। तें श्रीरामासीं केंवी साहे॥४८॥ लिंग उपडितां वायुनंदन। उगाचि पहात रघुनंदन। हनुमान क्षोभला आपण। त्यासी प्रतिवचन काय बोलों॥४९॥ म्हणोनि उगाचि रघुवीरा। परी कोणाहि न कळे विचार। मौनाचें काय अंतर। न कळे साचार सुरसिद्धां॥५०॥

अभिमानामुळे मारुतीला दृष्टीला अंधत्व: अभिमानाचें निजबळ। दृष्टी आच्छादिली सकळ। अवघें ब्रह्मांड शून्यमंडळ। राम केवळ भासेना॥५१॥ जो क्षणही न विसंबे जाण। तो जवळी असतां रघुनंदन। स्वयें न देखे वायुनंदन। देखणेपण बुडालें॥५२॥ राम नाहीं जंव तेथें। तंव उपडूनि सांडूं लिंगातें। प्रतिष्ठूनि म्यां आणिलें तें। मग श्रीरामातें पैं भेटों॥५३॥

---

शब्दार्थ : १. नागवलों, २. बडबड, ३. अंती ४. उपटू.

नवल अभिमानाची गती। जवळी असतां श्रीरघुपती। सिद्ध संमुख न देखे मारुती। निजाभिमानें करूनी॥५४॥

मारुतीची शेपटी तुटून तो मूर्च्छित होऊन कोसळला : वेंटाळूनि पुच्छेंकरीं। लिंग उपडितां कपिकेसरी। लांगूल तुटलें झडकरी। पडिला धरेवरी मूर्च्छित॥५५॥ प्रळयकाळींचेनि सत्राणें[1]। बळ केलें हनुमंतानें। तितुकें वृथा गेलें अभिमानें। धिक् जिणें अभिमानिया॥५६॥ वज्रदेही मारुती। ऐसें पुराणें गर्जती। त्याची झाली सकळ शांती। नवल करिती सुरसिद्ध॥५७॥

गर्वोन्मत्त इंद्र व दुर्वास यांची दुर्दशा: ज्ञानाभिमानें निश्चितीं। सर्वांगीं भगें[2] अमरपती[3]। स्वयें झाली निमेषगती। सांगों किती नवलावो॥५८॥ ज्ञानाभिमानें दुर्वासऋषी। छळूं गेला अंबरीषासी। कोलितें ख्याति लाविली त्यासीं। त्रैलोक्यासीं हिंडविलें॥५९॥ मग सांडोनि अभिमानस्थिती। शरण आला अंबरीषाप्रती। तेणें वांचविला निमेषगती। निरामिभान-स्थिती अगाध॥६०॥ परोक्ष जे अभिमानस्थिती। तिची ऐसी कठिण गती। अपरोक्ष असतां श्रीरघुपती। न चले निश्चितीं अभिमान॥६१॥ न विचारितां राममहिमान। स्वयें केला अभिमान। तेणें पडिला उलथोन। लज्जायमान अतिदुःखी॥६२॥ सुटले रुधिराचे पाझर। मूर्च्छा आली अति दुर्धर। भयभीत वानर वीर। हाहाकार वर्तला॥६३॥ खुंटल्या सकळांच्या वृत्ती। न चले कोणाची विनंती। कठिण भारी रघुपती। कांही युक्ती चालेना॥६४॥

मारुतीसाठी शंकरांची रामाला प्रार्थना व रामस्तुती : तेणें काळें विश्वनाथ। प्रत्यक्ष होवोनि त्वरित। विनविता झाला रघुनाथ। अति विनीत होवोनियां॥६५॥ त्राहें[4] त्राहें जी श्रीरामा। भक्तकामकल्पद्रुमा। विश्वाचा तूं विश्वात्मा। मेघश्यामा कृपा करीं॥६६॥ जन्मजन्मांतरीं अनवच्छिन्न। आम्हीं केलें आराधन। श्रीरामा तेणें समाधान। तुझें दर्शन आजी झालें॥६७॥ अनवच्छिन्न अखंडता। सर्वां भूतीं तूतें पाहतां। तुझी भेटी झाली आतां। ऐक तत्वतां सांगेन॥६८॥ सनकादिकांचें ध्येय पूर्ण। ते तुझे ध्येय श्रीचरण। मनीं करितां नित्य चिंतन। प्रत्यक्ष जाण भेटलासी॥६९॥ नारदादिक भक्तवृंद। तुझी चरणकीर्ति अगाध। आवडी गातां पदबंध। झाले निर्द्वंद्व सर्वभावें॥७०॥ तेणें संप्रदायें कीर्ति गातां। संसारभया हाणोनि लाता। तुजसीं भेटी श्रीरघुनाथा। झाली तत्वतां निश्चयें॥७१॥ सर्वां भूतीं तुझे श्रीचरण। सांडोनियां मानाभिमान। हर्षे नमन करितां जाण। स्वयें आपण भेटलासी॥७२॥ सर्वेंद्रियें सर्वभावेंसीं। तुज भजिन्नलों अति प्रीतीसीं। तें आजि आलें अति फळासीं। श्रीचरणासी पावलों॥७३॥ आजिचेंनि सफळ कुळ। येणें देहें रघुकुळपाळ। स्वयें अविकळ[5] देखिलासी॥७४॥ शास्त्रव्युत्पत्ती व्याख्यान। चिरकाळ साधिलें जाण। तें फळा आलें संपूर्ण। तुझे श्रीचरण देखिले॥७५॥ ज्ञानाचें फळ विज्ञान। तेथें त्रिपुटीचें निर्दळण। तेणें तुझें रूप संपूर्ण। सच्चिद्धन श्रीरामा॥७६॥ जें नामरूपगुणातीत। निगम[6] परतले नेति म्हणत। तें रूपा आलें मूर्तिमंत। भक्तकार्यार्थ श्रीराम॥७७॥ भक्तकाजकैवारी। ऐसें गर्जत श्रुतिशास्त्रीं। तो तूं कोपसी आम्हांवरी। तैं कैसेनि उरी उरे स्वामिया॥७८॥

मीच मारुतीला तशी प्रेरणा दिली असे रामांना शंकर सांगतात : हनुमान नव्हे अभक्त। अथवा नाहीं केलें उद्धत। प्रकाशावया तुझें चरित। करणी निश्चित हे माझी॥७९॥ दक्षिणे येवोनि रघुनंदन। पाषाणीं करोनि सेतुबंधन। श्रीरामें केलें लागतां क्षण। चरित्र पावन जगद्वंद्य॥८०॥

---

शब्दार्थ : १. जोराने, २. छिद्रे, ३. इंद्राला, ४. संरक्षण कर, ५. सुखरूप, ६. वेद, श्रुती.

श्रीरामाचा प्रताप। प्रकाशावया तीर्थरूप। हनुमंतहातीं साटोप[1]। करावया अल्प बुद्धि माझी॥८१॥ तंव झालें विपरीत। झाला अभिमानाचा घात। नेणोनि श्रीरामाचें सामर्थ्य। मूर्ख मिरवित अभिमान॥८२॥ तथापि कृपाळु रघुनाथ। उत्संखळ होवों नेदी भक्त। लांगूल छेदोनियां त्वरित। पडिला हनुमंत धरेवरी॥८३॥ तेणें माझा अंतराभिमान। हनुमंताचा बळाभिमान। करोनि दोहींचें उपमर्दन। केलें शिक्षण इतरांसी॥८४॥ आमुचा प्रताप किती। जे विस्तारूं श्रीरामकीर्ती। आपुली आपण निजख्याती। स्वयें रघुपति विस्तारी॥८५॥ ते कीर्तीचें महिमान। श्रीरामा ऐक सावधान। साकल्यें सांगावया पूर्ण। सर्वथा ज्ञान मज नाहीं॥८६॥

क्षेत्रं राममिदं विद्धि द्वितीयमविमुक्तकम्। विश्वेश्वरो वयं साक्षाद्धनूमांश्च वयं तथा॥२॥
मा कुरुष्वात्र संदेहं त्वमहं विद्धि सर्वशः। शिवशिवेति वचो ब्रूयाद्रामः शिवपदं गतः॥३॥

मारुतीला क्षमा करून उठविण्याची विनंती : हें रामक्षेत्र विख्यात। दुसरें जाण अविमुक्त। दर्शनें मुक्ति पतिता होत। ख्याति अद्‌भुत तिहीं लोकीं॥८७॥ तुझे अंशावतार रघुपति। ब्रह्मा विष्णु रुद्रमूर्ति। तेथें आमची कवण गति। तरी अंश निश्चिती तुझे आम्ही॥८८॥ पूर्वपरंपरा स्थिती। तुझे वचन रघुपती। माझे एके अंशे निश्चितीं। अवघें जग चिन्मूर्ती पैं माझी॥८९॥ त्यांत आम्हींही साचार। हनुमान आणि मी विश्वेश्वर। केवळ तुझे अंशावतार। जाण साचार श्रीरामा॥९०॥ ये अर्थी संदेहस्थिती। सर्वथा नाहीं रघुपती। उपरत[2] करोनियां वृत्ती। पाहें निश्चितीं सावध॥९१॥ सावध व्हावें श्रीरघुनाथा। ऐसें आम्ही तुज सांगतां। लागताहे उद्धतता। क्षमा त्या अर्था करीं स्वामी॥९२॥ कृपा करोनि रघुनाथा। आतां उठवावें कपिनाथा। ऐकतां शिववचनार्था। पावली तत्वतां निजखूण॥९३॥

'शिव शिव' म्हणताच रामांना समाधी लागल्यामुळे सर्वजण सचिंत : शिव शिव म्हणतां जाण। झाला शिवपदीं लीन। जेथें नाहीं मीतूंपण। ध्येय ध्यान जेथें नाहीं॥९४॥ केवळ जें सच्चिद्धन। सुखमय सनातन। स्वयें तेथें झाला निमग्न। जेंवी लवण सागरीं॥९५॥ शिव शिव म्हणतांच रघुनाथ। झाला शिवपदीं लयंगत[3]। तेणें सकळ झाले विस्मित। विश्वनाथ आदिकरोनी॥९६॥ खुंटली सकळांची युक्ती। ध्यानस्थ झाला रघुपती। हडबडिल्या[4] वानरपंक्ती। कार्यस्थिती नासली॥९७॥ समाधि लागली रघुपती। कोण वधील लंकापती। केंवी सुटे सीता सती। आली ग्रहगती सकळांची॥९८॥ मेलो आणितां पाषाण। कष्टें केलें सेतुबंधन। तें वृथा गेलें संपूर्ण। दुस्तर विघ्न ओढवलें॥९९॥ कैंचे मांडलें फळभोजन। कैंचें ओढवलें शिवदर्शन। कोठें पाठविला वायुनंदन। दुस्तर विघ्न ओढवले॥१००॥ परमात्मा श्रीरघुनंदन। त्यासीं कां लागलें शिवदर्शन। लोकसंग्रहार्थ विधिपाळण। करितां विघ्न केवढें॥१॥ जो वज्रदेही मारुती। तो मूर्च्छित पडिला क्षितीं। पुच्छ तुटले निमेषगती। कार्यस्थिती नासली॥२॥ समाधि लागली श्रीरामासी। कोण सावध करी त्यासी। कोण सोडवील जानकीसी। वधील रावणासी पैं कोण॥३॥ जवळी बैसला विश्वनाथ। तेणेंचि नाशिला कार्यार्थ। श्रीराम केला समाधिस्थ। पडिला हनुमंत मूर्च्छित॥४॥ मूर्च्छित करोनि कपींद्रा। भुलविलें श्रीरामचंद्रा। आपण होवोनि घाबिरा। निवांत म्हातारा बैसलासे॥५॥ म्हणोनि करिती कोल्हाळ। कासावीस गोळांगूळ। सुटली सकळां तळमळ। कार्य सकळ नासलें॥६॥ देखोनि सकळांचें चेष्टित[5]। शंकर झाला अति सचिंत। होवोनि ठेलें विपरीत। झाला समाधिस्थ श्रीराम॥७॥ सावध न करितां रामासी। आकांत होईल सर्वांसीं। कोण

शब्दार्थ : १. प्रयत्न, २. शांत, ३. पूर्ण मग्न, ४. भाल्या, ५. वर्तन.

उठवील हनुमंतासी। वधील रावणासी पैं कोण॥८॥ सावध न होतां रघुनाथ। केंवी सुटे जनक दुहिता। सकळ वनवास होईल वृथा। बोल अनागता[१] लागेल॥९॥ आमुचीही न उरे उरी[२]। उपहास होईल चराचरीं। म्हणोनि साटोप धरी त्रिपुरारी। समाधि निर्धारीं उतरावया॥११०॥ श्रीराम सुखाच्या अंतरीं। प्रवेशोनि झडकरीं। लोकरक्षणाच्या उत्तरीं। झाला कामारी विनविता॥११॥

राम राम महाबाहो महापुरुष चिन्मय। नायं विश्रांतिकालो हि लोकानंदमयो भव॥४॥

शंकरांनी रामांना सावध करून अकाली समाधी घेऊ नये असे सुचविले : चैतन्याचेनि प्रभावें वहिली। जीवकळा सावध केली। प्राणशक्ति परिचारिली। इंद्रियां आली टवटवी॥१२॥ श्रीरामाच्या निजशरीरीं। जीवित्व नाहींच निर्धारीं। मिथ्याच लोकोपकारीं। जीवित धरी श्रीराम॥१३॥ सावध होतांचि रघुनाथ। विनविता झाला विश्वनाथ। अकाळीं होतां समाधिस्थ। होईल आकांत सकळांसीं॥१४॥ तुज होतां समाधिस्थ। मृषा भाष्य अनागत। तुझे वियोगें अत्यंत। अति दुःखित जानकी॥१५॥ तिसीं द्यावया समाधान। वेगीं सोडूनियां बाण। निवटोनियां दशानन। बंदिमोचन करीं सुरगणांचें॥१६॥ सोडवीं देवांचिया कोडी। तोडीं नवग्रहाची बेडी। सीता सोडवून तांतडीं। उभवीं गुढी रामराज्याची॥१७॥ निवटोनि दुष्ट राक्षसगण। स्थापीं धर्मात्मा बिभीषण। चित्तें वित्तें जीवितेंकरोन। अनन्य शरण तुजलागीं॥१८॥ अवघ्या त्रैलोकीं तुजवीण। झालीं मृतप्राय पूर्ण। त्यांसीं न देतां समाधान। समाधि जाण अति निंद्य॥१९॥ समाधिउत्थानापरता पूर्ण। परमात्मा तूं रघुनंदन। तेणें समाधिस्थ होऊन। काय अधिकपण साधावें॥१२०॥ सावध ऐकें कृपानिधी। श्रीरामा समाधि ते उपाधी[३]। सांडीं परती आहाच बुद्धी। होईं त्रिशुद्धी सावध॥२१॥ तूं प्रकृतिपुरुषांहूनि भिन्न। चिन्मात्रैक चैतन्यघन। महापुरुष हें अभिधान। यालागीं जाण तुज म्हणती॥२२॥ अवतारनाट्य रघुपती। जैसें घेतलें तैशा रीतीं। संपादावें यथानिगुतीं। सांडीं परती समाधि॥२३॥ करोनि कृपावलोकन। सकळ अपराध क्षमा करून। उठवावा वायुनंदन। दशानन निवटावा॥२४॥

श्रीरामांनी सावध होऊन शंकरांना वंदन केलें : ऐसी शंकराची विनवण। ऐकतांचि रघुनंदन। आनंद उथळला पूर्ण। करोनि लोटांगण शिव विनविला॥२५॥ सांडोनियां समाधिअवस्था। विनविता झाला विश्वनाथा। तुझी आज्ञा यथार्थता। वंद्य तत्वतां मजलागीं॥२६॥ नव्हे अपराधी हनुमंत। नाहीं केलें उद्धत। क्षेत्रमहिमा अत्यद्भुत। हनुमंतें साद्यंत प्रकाशिला॥२७॥ व्हावी सेतुबंधख्याती। पतित उद्धरावे निश्चितीं। अल्प नव्हे तपःस्थिती। मोक्ष सर्वांसी द्यावया॥२८॥

शिवरामाभिधं लिंगं स्थापितं विधिवच्छुभम् । सेतौ रामेश्वरं लिंगं केवलं ब्रह्म उच्यते॥५॥

रामेश्वरक्षेत्राचा महिमा वर्णन: ऐके स्वामी विश्वनाथा। सेतुबंधमाहात्म्यकथा। तुज सांगेन साधारणता। साकल्यता[४] कोण वर्णी॥२९॥ या सेतुबंधाचे तीरीं। दोन्हीं लिंगांची अभिनव परी। जें आणिलें कपिकेसरी। तो निर्धारीं विश्वनाथ॥१३०॥ स्वामी शंकर आपण। ज्योतिर्मय प्रकाशोन। जेथें प्रत्यक्ष झालासी जाण। ज्योतिर्लिंग पूर्ण हें स्वामी॥३१॥ कल्पाचिये आदीं निश्चित। शिव सनातन सर्वगत। तो तूं आजि प्रगटलासी येथ। कृपायुक्त पैं स्वामी॥३२॥ याकारणें अनादी। ज्योतिर्लिंग पैं त्रिशुद्धी[५]। विश्वोद्धाराचिये विधीं[६]। कृपानिधी आलासी॥३३॥ माझें निजध्येय संपूर्ण। तें हें ज्योतिर्लिंग जाण। म्हणोनि माझें

शब्दार्थ : १. भविष्यकथनास, २. स्थिती, ३. त्रास, ४. पूर्णपणें, ५. खरोखर, ६. करिता.

अधिष्ठान। निरंतर जाण पैं येथें॥३४॥ शिव रामात्मक सत्य। जो राम तो ईश्वर नित्य। सुखें अभेदत्वें नांदत। रामेश्वर निश्चित म्हणोनि॥३५॥ ख्याति अद्भुत करून। हनुमंतें आणिलें प्रार्थून। विश्वेश्वर तो सत्य जाण। नामनिर्वचन उभयतां॥३६॥ शिवरामात्मक क्षेत्र। सेतुबंधरामेश्वर। अनायासें प्राणिमात्र। उद्धरी साचार तें ऐका॥३७॥ भलतेन प्रकारें पाहीं। रथ्यांतरीं[1] पडतां देही। अथवा मूत्रपुरीषाचे[2] ठायीं। श्मशानभूमीमाझारीं॥३८॥ योनीमाजी नीच पाहीं। सेव्यासेव्य विभाग नाहीं। देह सांडितां चांडाळगेहीं। अवसान जिंहीं साधिलें॥३९॥ भलते योनी भलता प्राणी। कृमिकीटपतंगादि योनी। रामक्षेत्रीं प्रयत्नेंकरोनी। अथवा काशीमाजी सहजगती॥१४०॥ निश्चयेंसीं देहांतीं। प्राणिमात्रा लाभे मुक्ती। संदेह नाहीं यदर्थी[3]। वेदशास्त्रार्थी सिद्धांत॥४१॥ ज्यासीं नव्हे योगयाग। तपश्चर्या व्रत सांग। तीर्थाटन दानप्रसंग। साधनभाग कांहीं नेणे॥४२॥ न करितां कष्ट प्रयास। देह त्यागिल्या सेतुबंधास। लात देवोनि संसारास। मोक्षपदास पावती॥४३॥ असो देहावसनगोष्टी। रामेश्वर देखतां दृष्टीं। उद्धरती कोट्यनुकोटी। ज्यांचीं खोटीं आचरणें॥४४॥ ज्यांतें देखतां निर्धारीं। सदाचार पळे दूरी। ऐसे पापी दुराचारी। दर्शनमात्रें उद्धरती॥४५॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य त्रिविध। सकळांमाजी वर्ण शुद्ध। त्याहीहोनि जे विविध। वर्णसंकर सुबद्ध झाले॥४६॥ ते ब्राह्मणादि सकळ लोक। लिंगदर्शनें एकाएक। चतुर्देह निरसोनि देख। राम सम्यक पावती॥४७॥ परमामृत परब्रह्म। गुणातीत श्रीराम। तेथें पावती आराम। रूप नाम हारपोनी॥४८॥ संकरयोनि नीच जन। ते उद्धरती नवल कोण। महापापी पतित दुर्जन। तेही दर्शनेंकरोन उद्धरती॥४९॥

पंचमहापातकी व त्यांची लक्षणे : महापातकियाचें लक्षण। ब्रह्महत्या मद्यपान। सुवर्णस्तेयी[4] गुरुदारगमन। तत्संसर्गी पाचवा॥१५०॥ हे पंचमहापातकी पूर्ण। त्यांचे वेगळालें चिन्ह। तुज मी साकल्यें सांगेन। सावधान अवधारीं॥५१॥ ब्राह्मणातें जिंती वादीं। कां निर्भर्त्सी सभेमधीं। अथवा करी परसूत्रबुद्धी[5]। घात त्रिशुद्धीं जेणे होय॥५२॥ शस्त्रघाताहूनि दारूण। हे घात अधिक जाण। शस्त्रघातें एकासीं मरण। छळणें जाण कुटुंबघात॥५३॥ ऐसी ब्रह्महत्येची गती। ऐक मद्यपानाची स्थिती। सांगेन मी संकळितीं। क्षमा श्रोतीं करावी॥५४॥ लौकिकीं प्रसिद्ध पानमद। त्याहूनि कठिण अगाध। विषयाचा विषयमद। आणि धनमद पैं जाण॥५५॥ मद्यपान केलिया पाहीं। क्षणें उतरें लवलाहीं। विषयमद्याची[6] नवायी। कल्पांतींही उतरेना॥५६॥ कोटिजन्म फेरे खातां। विषय खवळे अधिकता। उतार नव्हे सर्वथा। स्वहितवार्ता नाठवे॥५७॥ घृतीं खवळे हुताशन। तेंवी करितां विषयसेवन। अधिकाधिक खवळे मन। उतार जाण असेना॥५८॥

धनमदाची स्थिती: त्याहूनियां अनंत अधिक। धनाचा मद आत्यंतिक। अंध होवोनि ठाके विवेक। हिताहित नाठवे॥५९॥ धनमदाची जाती पाहीं। माता पिता दृष्टी नाहीं। आदिकरोनि गुरु तोही। दृष्टी नाहीं सर्वथा॥१६०॥ तेथें अतीतासी पुसे कोण। व्रत तप तीर्थ जाण। त्यांची कैंची आठवण। मद दारुण द्रव्याचा॥६१॥ सुवर्णस्तेयी जे कां जन। ऐक सांगों त्यांचें चिन्ह। स्वहस्तें चोरिल्या सुवर्ण। स्तेयी जाण नवल नव्हे॥६२॥ मार्गी द्रव्य पडिलें असतां। कोणी माझें न म्हणता। म्हणोनि स्वयें घेवो जाता। चोरी सर्वथा अंगी लागे॥६३॥ जरी चोरी नव्हे सर्वथा। तरी भय कां उपजे घेवो जातां। झांकोनि घेवोनि

शब्दार्थ : १. रस्त्यांत, २. मूत्र व नरक यांत, ३. ज्याविषयीं, ४. सोने चोरणारा, ५. गुप्त मसलत, ६. नवलाची गोष्ट.

तत्वतां। कोणा न देखतां पुढें पळे॥६४॥ द्रव्यालोभाची वस्ती अंतरीं। तो लोभचि जाण यथार्थ चोरी। करवी अनर्थाच्या हारी। नरकद्वारीं बांधोनि घाली॥६५॥

गुरुदारगमनी कोण: लोभ तो तस्कर पूर्ण। बळें नरका ने बांधोन। आतां गुरुतल्पगाचें लक्षण। सावधान अवधारीं॥६६॥ केवळ जें गुरूदारगमन। तें प्रत्यक्ष वज्रपाप दारुण। त्याहूनि आणिक गहन। त्याचें चिन्ह अवधारीं॥६७॥ पुढिलाचें चोरितां धन। सुवर्णस्तेयी पाप दारुण। न्यायें मेळविलें आपण। त्याचेंही चिन्ह अवधारीं॥६८॥ न्यायोपार्जित संपत्ती। त्याचा व्यय धर्मस्थितीं। अणुमात्र लोभ धरितां चित्तीं। पाप निश्चितीं गुरुतल्पग॥६९॥

लक्ष्मीर्विश्वगुरोर्भार्या स्वयमालिंग्य तिष्ठति। न देयं नोपभोग्यं च स एव गुरुतल्पगः॥६॥

वेदवक्ता स्वयें नारायण। वर्णविभागें[१] करी शासन। वेदरूप स्वयें आपण। विश्वगुरू जाण या हेतू॥१७०॥ त्या विश्वगुरूची भार्या निश्चितीं। लक्ष्मीरूपें जे संपत्ती। स्वेच्छा पोटेंसी धरिती। स्वयें नार्पिती ज्याची त्यासी॥७१॥ लक्ष्मी देखोनियां जाण। जो तो करी अभिलाषण। विचार न करिती संपूर्ण। मी कैंचा कोण हे कैंची॥७२॥ मी जैं आलों जन्मातें। तैं लक्ष्मी नव्हती सांगातें। देहावसानें निश्चितें। मजसांगातें पैं नये॥७३॥ भगवंत कृपान्वित। मज देखोनि अनाथ। प्रसन्न होवोनि त्वरित। लक्ष्मी अद्‌भुत मज दिधली॥७४॥ विश्वात्मा विश्वमूर्ती। त्याची त्यासी अर्पावी संपत्ती। हें न करोनि निश्चितीं। स्वयें अभिलाषिती॥७५॥ विश्वगुरूची निजपत्नी। त्याची त्यासी पैं नार्पूनी। अभिलाषी जो लोभेंकरोनी। गुरुतल्पग कोणी याहूनि नाहीं॥७६॥ एकेकाची जाती ऐसी। स्वयें नेती अधःपतासी। तेथोनि निर्गम[२] नाहीं त्यासी। जेंवी अथावीं[३] पाथर॥७७॥ सर्वथा निर्गती नव्हे त्यासी। नवल नाहीं या अर्थासी। त्याची संगती घडेल ज्यासी। दशा तैसी त्याचीही॥७८॥

दुर्जन संगतीचे दुष्परिणाम : ऐक संगाचें महिमान। ज्यासी संगती घडे पूर्ण। तरी त्याचेंहि घेऊनि उठे चिन्ह। आपुला निजगुण आच्छादी॥७९॥ संगतीचे योगें जाण। शेळियांमाजी असतां श्वान। लोभ वाढे संपूर्ण। भासे जाण तद्रुप॥१८०॥ सबाह्य भासे तद्रूपता। नवल नाहीं या अर्थां। अंतर भेदोनि तत्वतां। संग सर्वथा अंगीं वाजे॥८१॥ आळें करोनि कस्तूरींचें। रोप लाविलें पलांडूचें। सुवास आच्छादोनि साचें। दुर्गंधीचें बळ वाढे॥८२॥ श्वानखापरीमाजी[४] देख। गोधूम[५] पेरितां सुरेख। शुद्धत्व हरपे एकाएक। अशेख होत लसूणचि॥८३॥ तेंवी दुर्जनाच्या संगें जाण। बुडोनि आपला सद्गुण। त्याचा लागे असद्गुण। तदाचारी जाण प्रवर्ते॥८४॥

सज्जन संगतीचे सुपरिणाम : तैसीच सत्संगाची स्थिती। नीच पावती महंती। घुरे ते चंदन होती। जाण संगतीं चंदनाचे॥८५॥ उंडणी[६] चढों नेणे भिंती। तिसी भयें होतां भृंगीत्वप्राप्ती। पालटोनि देहस्थिती। गगनीं उडती देहेंसीं॥८६॥ तैसे अकिंचन[७] भावार्थी। भावें धरितां सत्संगती। साधुत्वासी स्वयें येती। ऐक तदर्थीं सांगेन॥८७॥ निंद्य आचरण वाल्मीकाचें। दर्शन होतां नारदाचें। जगद्वंद्य अनागत ज्याचें। चरित्र रामाचें प्रसिद्ध॥८८॥ आणिक किती सांगों नर। खग द्रुम मृग निशाचर। नामें सांगतां सविस्तर। कथा अपार वाढेल॥८९॥ म्हणोनि मनसा वाचा कर्मणा। सत्संगती सांडोनि जाणा। असत्संगति करितां पूर्णा। नरक दारुण अंगीं वाजे॥१९०॥ महापातकियाचे संगतीं। महापातकी स्वयें होती। त्यांसी नाहीं ऊर्ध्वगती। उभयतां निश्चितीं पतित होती॥९१॥ ज्यासी नाहीं ऊर्ध्वगती। ऐसे दुराचारी निश्चितीं। तेही रामेश्वरा जरी येती। दर्शनें मुक्ती तयांसी॥९२॥ दर्शनें होय पापमोचन। ये अर्थी नवल कोण। रामेश्वरस्मरणेंकरोन। देहपतन जरी होय॥९३॥ तरी महापातका देवोनि

शब्दार्थ : १. चार वर्ण स्थापन करून, २. सुटका, ३. खळग्यांत, ४. दुर्गंधियुक्त वनस्पतिविशेष, ५. गहू, ६. कीड, ७. दरिद्री.

लात। स्वयें होती नित्यमुक्त। सर्वथा संदेह नाहीं येथ। त्रिसत्य सत्य ते वाणी ॥९४॥ आणिक ऐक पशुपती। तुज मणिकर्णिकेची अति प्रीती। वास करितां सेतुप्रती। अवस्था चित्तीं लागेल॥९५। यालागीं मी आपण। नित्य मणिकर्णिकेचें जीवन । तुज स्नानासी पुरवीन। स्वयें जाण विश्वनाथा॥९६॥ हेंचि माझें नित्यव्रत। मणिकर्णिकेचें नीर नित्य। पुरविती तेही नित्यमुक्त। अंश निश्चित पैं माझे॥९७॥ भलता प्राणी भलते याती। स्वयें जावोनि वाराणसीप्रती। मणिकर्णिका तीर्थ आणिती। अभिषेकिती रामेश्वरा॥९८॥ ते सकळ कुळेंसहित। स्वयें होती नित्यमुक्त। ऐसें ऐकतां विश्वनाथ। हर्षितचित्त स्वयें झाला॥९९॥ घालोनियां लोटांगण। विनविला रघुनंदन। मनोरथ झाले संपूर्ण। क्षेत्रमहिमान वाढविले॥२००॥ आतां उठवावें हनुमंता। पुच्छ सांधावे स्वामिनाथा। कृपाळु बा रघुनाथा। निजभक्ता कृपा करीं॥१॥ म्हणोनि धरिले दोन्ही चरण। वेगें उठवी वायुनंदन। तेणें संतोषला रघुनंदन। तुझी आज्ञा कोण उल्लंघी॥२॥

श्रीरामांनी हनुमंताला सावध केले, तुटलेले पुच्छ जोडले : जवळी येवोनी रघुनाथ। उचलोनि पोटीं धरित। अमृतहस्त तेथें फिरवित। झाला सावचित्त हनुमंत॥३॥ लांगूल लावितां जेथीचें तेथ। स्वयें सांदलें यथास्थित। बाप कृपाळू रघुनाथ। अति विख्यात पवाडा॥४॥ हनुमान झाला सावचित्त। तंव श्रीरामाचे वोसंगीं[1] देखत। तेणें झाला लज्जान्वित। अति विख्यात पवाडा[2]॥५॥

मारुतीचा अनुताप व श्रीरामांची क्षमायाचना: माझी करणी मजचि फळली। शीक[3] नेटकी लाविली। श्रीरामाची अवज्ञा केली। तेणें धुळी मेळविलें॥६॥ मी एक भक्त अनुरक्त। वरी वज्रदेही विख्यात। ऐसा फुगारा पोटांत। होता नांदत निजबळें॥७॥ त्याची करोनि भंगाणी[4]। संस्थापिलें श्रीरामचरणीं। कृपेची ख्याती त्रिभुवनीं। पावन करणी जगद्वंद्य॥८॥ जरी दंड मज न होता। तरी निजकर्मे रघुनाथा। स्वयें जातों अधःपाता। कोण सोडविता मज तेव्हां॥९॥ निजकृपेची महिमा ऐसी। चुकविलें अधःपातासी। श्रीरामें ख्याति केली ऐसी। उणें भक्तासीं येवों नेदी॥२१०॥ जरी झालीं उद्धतें। तरी दंडोनियां स्वहस्तें। स्वचरणीं स्थापावें निश्चितें। पाहों आणिकांतें नाहीं देणें॥११॥ ऐसें विनवोनि आपण। हनुमान घाली लोटांगण। तेणें संतोषला रघुनंदन। काय वचन बोलत॥१२॥

मारुतीला आश्वासन : चिंता न करीं हनुमंता। तुजपासोनि न घडे अन्यथा। क्षेत्रमहिमेलागीं तत्वतां। केलें सर्वथा विश्लेशें॥१३॥ तुज होतां हे अवस्था। स्वयें झाला विनविता। स्वामींचें वैभव नेणतां। केली उद्धतता मर्कटपणें॥१४॥ तुज न होतां हे अवस्था। क्षेत्रमहिमा कोण सांगता। संवाद करितां विश्वनाथा। महिमा तत्वतां प्रकाशला॥१५॥

ज्योतिर्मे स्थापितं चात्र ज्योतिर्लिंग भविष्यति। शतकल्पाधिकं ज्योती राम इत्यक्षरद्वयम्॥७॥

ज्योतिर्लिंग का म्हणतात?: चैतन्यज्योति विश्वनाथें। प्रतिष्ठिली[5] माझेनि हातें। म्हणोनि ज्योतिर्लिंग ऐसें त्यातें। निजनिश्चितें अभिधान[6]॥१६॥ सनातन आत्मज्योती। त्यावरी कल्पकोटी होती जाती। म्हणोनि कल्पादि यातें म्हणती। निजनिश्चितीं ज्योतिर्लिंग॥१७॥

रामेश्वरं तु मल्लिंगं सेतुबंधे विराजते। सेतुबंधादिकाख्यानं भक्त्या यः श्रुणुते नरः॥८॥

यात्राफलं स प्राप्नोति गत्वा च परमां गतिम्॥९॥

ज्योतिर्मय निजनित्य। ज्योतिर्लिंग शिवरामयुक्त। रामेश्वर म्हणोनि म्हणत। जाण निश्चित हनुमंता॥१८॥ तें हें रामेश्वरलिंग जाण। सेतुबंधीं विराजमान। तेथींची यात्रा दर्शन। उद्धरी पूर्ण नवल नव्हे॥१९॥ तुम्ही आम्ही आणि शिवेश्वर। संवाद केला जो साचार। तें हें

शब्दार्थ : १. मांडीवर, २. कीर्ती, ३. शिक्षा, ४. मोड, ५. स्थापिली, ६. नाव.

सेतुमाहात्म्यचरित्र। परिसें एकाग्र निजचित्तें ॥२२०॥ सबाह्याभ्यंतर सावधानता। तल्लीन होवोनियां श्रोता। सेतुमाहात्म्य श्रवण करितां। निजमुक्तता पाविजे ॥२१॥ कावडी भरोनि मणिकर्णिकेसीं। प्रीतीं आणोनि सेतुबंधासीं। अभिषेकितां रामेश्वरासीं। रामरूपासीं स्वयें होय॥२२॥ तेंचि फळ निजनिर्धारीं। सुचित्तचित्ते श्रवण करी। यात्राकर्त्याचे निजशिरीं। निजगजरीं मोक्ष पावे॥२३॥ ऐसें ऐकतां विश्वनाथ। पुढें होवोनि त्वरित। उठिला देखोनि हनुमंत। स्वयें वर्णित साटोपे[1] ॥२४॥

रामतीर्थे नरः स्नात्वा दृष्ट्वा रामेश्वरं शिवम्। कैवल्यं पुरुषः साक्षदवाप्नोति न संशयः॥१०॥
काश्यामपि मृतस्यांतस्तारकं ब्रह्म कथ्यते। तदैव परमं साक्षाद्राम इत्यक्षरद्वयम्॥११॥

श्रीहनुमंतकृत रामेश्वरमहिमा : श्रीरामे बांधिला पाहीं। त्या सेतुसमुद्राचे ठायीं। स्नान करोनि लवलाहीं। रामेश्वर जिहीं देखिला॥२५॥ काय सांगों त्यांचें महिमान। ते स्वशरीरें कैवल्यघन[2]। अणुमात्र संदेह नाहीं जाण। निश्चयें वचन हें माझें॥२६॥ आनंदवनीं काशीपुरीं। देहांती जो उपदेश करी। दोंचि अक्षरीं जग उद्धरी। तो मूर्त निर्धारीं रामेश्वर॥२७॥ श्रीरामनाम युग्माक्षर। क्षराक्षरातीत पर। वचनें करितां उच्चार। ब्रह्म परात्पर स्वयें पावे॥२८॥ त्याचेनि दर्शनें त्वरित। कोण नुद्धरे यथार्थ। परब्रह्म मूर्तिमंत। लोकोपकारार्थ अवतरलें॥२९॥ ऐसें वर्णितां विश्वनाथा। ऐकोनि आनंद समस्तां। श्रीरामनामें तत्वतां। होय गर्जता दळभार॥२३०॥ अगाध श्रीरामाचें महिमान। अगाध सेतुबंधाख्यान। अगाध विश्वेश्वराचें ध्यान। भक्ति गहन हनुमंताची॥३१॥

विश्वेश्वरकृत सेतुबंध रामेश्वराचे माहात्म्य व रामस्तुती : ऐसें सकळ वानरगण। श्रीरामाचें करिती स्तवन। तंव विश्वेश्वर मागुतेन। पुढें होवोन बोलत॥३२॥ सेतुबंधा आला रघुपती। त्या सेतुबंधसागराप्रती। स्नान करिती रामतीर्थी। दर्शन घेती रामेश्वरा॥३३॥ ते पुरुषांमाजी पंचानन[3]। कैवल्यपुरुष पुरातन। माझें स्वरूप जें चिद्धन। तेंचि ते जाण स्वयें होती॥३४॥ निष्कर्म माझें स्वरूप परम। तें हें प्रत्यक्ष श्रीराम। त्याचा ज्यांसीं दर्शननेम। ते परब्रह्म मूर्तिमंत॥३५॥ ये अर्थी संदेहता। सर्वथा न मानावी चित्ता। त्रिसत्य सत्य माझी वार्ता। मनसा वाचा कर्मणा॥३६॥ हनुमानादि वानरगण। सौमित्रेंसहित बिभीषण। सकळ ऐका माझें वचन। सावधान मानसें॥३७॥ म्हणाल बोललों पुनरुक्त। तरी तें जाणा यथार्थ। श्रीराममहिमा वर्णितां चित्त। नव्हे तृप्त सर्वथा॥३८॥ श्रीरामनामेंवीण तोंड। तें प्रत्यक्ष चर्मकुंड। माझी जिव्हा चामखंड[4]। दुरुपवादें काटली[5]॥३९॥ आनंदवन काशीच्या ठायीं। प्रकृतित्याग[6] करितां देही। श्रवणीं उपदेशी लवलाही। तारकमंत्र पाहीं परब्रह्म॥२४०॥ तें हें साक्षात् निज नित्य। राम ऐसें युग्माक्षर सत्य। जिव्हा जपमाळ निश्चित। करोनि जपत सर्वदा॥४१॥ त्यासी काशी कां कीकटाच्या[7] ठायीं। अथवा कां चांडाळगेही। देह सांडितां लवलाहीं। गति पाहीं समान॥४२॥

योगी पततु वा काश्यां चांडालस्य गृहेपि वा। ज्ञानप्राप्तिः समस्तस्य गतोऽसौ विगताशयः॥१२॥

"विश्वोद्धारासाठीच रामांनी वनवास स्वीकारला" सीता : तुझेनि योगें येवढी ख्याती। स्वयें प्रकाशिली रघुपती। ऐसें ऐकतांच सीता सती। घाली अति प्रीतीं लोटांगण॥४३॥ मी सर्वांसीं सोडवण। परी जग सोडवणें संपूर्ण। यालागीं श्रीरघुनंदन। वना आपण स्वयें आला॥४४॥ जड मूढ प्राणी दीन जन। जे व्रततपदानहीन। ज्यांसी नाहीं तीर्थदर्शन। त्यांचें उद्धरण केंवी होय॥४५॥ ऐसी कृपा श्रीरघुनाथा। दाटली अत्यंत चित्ता। म्हणोनि उद्धरावया

शब्दार्थ : १. आवेशाने, २. मुक्तिस्वरूप, ३. सिंह, श्रेष्ठ, ४. चामड्याचा तुकडा, ५. मलिन झाली, ६. देहत्याग, ७. कीकटनाशक दुष्ट देशांत.

अनाथां। वना तत्वतां श्रीराम आला॥४६॥ योगी पडतां काशीच्या ठायीं। अथवा चांडाळाच्या गृहीं। अथवा पडतां कीकटींही। रामस्मरणें पाहीं निजमोक्ष॥४७॥ ऐसें बोलतां गोरटी[१]। अंगी स्वेद बाष्प कंठीं। प्रेमाश्रूं[२] झांकली दृष्टी। न निघे वाक्पुटीं पैं शब्द॥४८॥ एका जनार्दना शरण। अति रम्य रामायण। उठवोनियां जनकनंदिन[३]। रामेश्वरदर्शन घेईल राम॥२४९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां रामेश्वरमहिमाकथनं नाम षट्सप्ततितमोऽध्याय:॥७६॥ ओंव्या॥२४९॥ श्लोक॥१२॥ एवं॥२६१॥

## अध्याय सत्त्याहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नम: ॥

### श्रीरामांना अयोध्यादर्शन

जानकीची प्रेमावस्था। देखोनियां रघुनाथा। हर्ष दाटला निजचित्ता। उचलोनि तत्वतां आलिंगिली॥१॥ उठवोनियां जानकीसी। रामेश्वरदर्शन घ्यावयासी। राम चालिला अतिप्रीतीसीं। विमान भूमीसीं उतरलें॥२॥

श्रीरामाचें विमान रामेश्वरी उतरताच ऋषींचे रामदर्शनार्थ आगमन: भूमीं उतरतां विमान। रामदर्शनालागून। आली ऋषिमंडळी धांवोन। केलें नमन अति प्रीतीं॥३॥ अगस्तिलोपामुद्रा-समवेत। ऋषी पातले समस्त। त्यांते दोखोनियां रघुनाथा। नमन करीत लोटांगणीं॥४॥ भूमीं उतरतां विमान। श्रीरामदर्शनालागून। तिहीं करोनियां उठवण। रघुनंदन नमियेला॥५॥ तेथे ऋषींचा जयजयकार। वानरवीरांचा भुभु:कार। नादें कोंदलें अंबर[४]। दिशा समग्र दुमदुमिल्या॥६॥ रावण निवटूनियां सकुळी। सोडविली सुरमंडळी। नवग्रहांची बेडी तुटली। संस्थापिलीं ऋषिकुळें॥७॥ श्रीरामें नमिले ऋषिगण। ऋषींनीं नमिला रघुनंदन। तुझेनि धर्मे जनस्थान। वसतिस्थान मुनिवरां॥८॥ हेंचि नवल सांगों किती। तुवां स्थापिली त्रिजगती। सृष्टि प्रतिपाळावया रघुपती। अवतार निश्चितीं पैं तुझा॥९॥

अगस्तिकृत रामगुणसंकीर्तन : ऐसा ऋषीश्वरांचा भार। स्तविते झाले रघुवीर। तंव अगस्तिलोपामुद्रा चतुर। स्तवन सत्वर करितीं झालीं॥१०॥ जय जय सकळकल्याणा। सकळमंगलनिधाना। सज्जनवनचंदना। सत्समाधाना कैवल्यनिधे॥११॥ जयजयाजी दुष्टनिर्दळणा। दु:खघ्ना द्वैतभंजना। द्वैताद्वैतदेखणा। देखणेपणां श्रीरामा॥१२॥ जय भवजाळनिरसना। मत्तभवइभभंजना[५]। भक्त जनसंरक्षणा। प्रेमपरिपूर्णा अनुग्रहशीळा॥१३॥ सुरसंकटनिरसना। सुरवरसंस्थापना। निवटोनियां दशानना। केलें त्रिभुवना संतुष्ट॥१४॥ ऋषि वाल्मीकाचें भाष्य। अनागत[६] अति सुरस। तें आणिलें सत्यास। केलें सकळांस संतुष्ट॥१५॥ पूर्वी मज श्रीशंकरें। सांगीतलें अत्यादरें। श्रीराम भेटेल निर्धारें। जाय सत्वरें दक्षिणेसीं॥१६॥ काशीविरहें अत्यंत। मी झालों अति दु:खित। तेणें काळें मज समस्त। चरित्र अनागत सांगितलें॥१७॥ जें ध्येय श्रीशंकराचें। निर्गुण ब्रह्म साचें। आजि दर्शन झालें त्याचें। फळले आमुचें भाग्य जें॥१८॥ निजभाग्याचा परम सोहळा। जो परब्रह्माचा पुतळा। तो श्रीराम घनसांवळा। स्वयें निजडोळां देखिला॥१९॥

श्रीरामांकडून अगस्तींची स्तुती: ऐसें अगस्तीचें वचन। ऐकतांचि रघुनंदन। स्वयें झाला हास्यवदन। कृतकल्याण तुझेनि आम्ही॥२०॥ घेवोनि स्वामीचें दर्शन। पुढारें करितां गमन।

---

शब्दार्थ : १. सीता सुंदरी, २. प्रेमाश्रूंनी, ३. जनकन्या (सीता) ४. आकाश, ५. प्रपंचरूपी माजलेल्या हत्तीचा नाश करणाऱ्या, ६. पुढील.

तुझे अनुग्रहें जाण। सकळ विघ्न निरसलें॥२१॥ तुझे निजकृपेंकरोन। आपेंआप दशवदन। निवटला न लागतां क्षण। ससैन्य जाण स्वामिया॥२२॥ तुझेनि धर्में कृपानिधी। सुखें सुटली सुरमांदी। स्वयें बैसले निजपदीं। निजानंदीं गर्जत॥२३॥ तुम्हीं वसविलें दंडकारण्य। तैंच निमाला रावण। तैं सुटले सुरगण। रघुनंदन निमित्तमात्र॥२४॥ ऐसें अगस्तीचें स्तवन। आच्छादोनि अवतारचिन्ह। करिता झाला रघुनंदन। तेणें ऋषिगण सुखरूप॥२५॥

लोपामुद्रेला सेतुची माहिती सांगू नये असे राम सीतेला सांगतात : रघुनाथ म्हणे जानकीसी। लोपामुद्रा पुसेल कीर्तीसी। तरी न सांगावें सेतुबंधासी। सांगता छळणासी पावसील॥२६॥ पुढील कथानुसंधान। रामेश्वरतीर्थविधान। सारावया रघुनंदन। सहित ऋषिगण चालिले॥२७॥ विधियुक्त स्नानतर्पण। तीर्थविधी पिंडदान। सकळीं संपादिलें संपूर्ण। श्रीरघुनंदन निजनिष्ठा॥२८॥

वैदेहि याहि कलशोद्भवधर्मपत्नीं तस्याः पुरः कथय पूर्वकथाः समस्ताः।
पृष्टापि मा वद पयोनिधिबंधनं तत्सा वै पुनश्चुलकितांबुनिधेः कलत्रम्॥१॥
ये मज्जंति निमज्जयांति च परांस्ते प्रस्तरा दुस्तरे वार्द्धौ वीर तरंति वानरभटान् संतारयंतेपि च नैते
ग्रावगुणा न वारिधिगुणा नो वानराणां गुणाः श्रीमद्दाशरथेः प्रतापमहिमा सोऽयं समुज्जृंभते॥२॥

सीता-लोपामुद्रेचा संवाद : येरीकडे जानकीसी। लोपामुद्रा अति प्रीतीसीं। क्षेमालिंगन निजानंदेसीं। महासायासीं भेटी झाली॥२९॥ भेटोनि येर येरीप्रती। लोपामुद्रा अति प्रीतीं। पुसती झाली श्रीराम कीर्ती। रावणघातीं केली जे॥३०॥ श्रीरामें करोनि वनाभिगमन। चरित्र केलें कोण कोण। हें मज अति प्रीतींकरून। स्वयें आपण सांगावें॥३१॥ ऐकतां लोपामुद्रेचें वचन। जानकी झाली आनंदघन। भावार्थाचें निजजीवन। नेणे छळण सर्वथा॥३२॥ भावार्थे सीता सती। सकळ श्रीरामाची कीर्ती। सांगती झाली अति प्रीतीं। विशेष ख्याती सेतुबंधाची॥३३॥ रावणवधाचेनि मिषें जाण। वाळी वधोनि रघुनंदन। सुग्रीवा केलें राज्याभिषिंचन। तारिले पाषाण सागरीं॥३४॥ समरांगणीं करोनि रण। ससैन्य सपुत्रप्रधान। निवटोनियां[१] दशानन। केला बिभीषण लंकापति॥३५॥

लोपामुद्रा अगस्तीच्या सामर्थ्याचे वर्णन करते : ऐकोनि जानकीची वचनोक्ती। येरी हांसिन्नली चित्तीं। विचार न करितां निश्चितीं। वानसीं कीर्ती रामाची॥३६॥ स्त्रीराज्यलोभेंकरून। वाळी निमाला आपण। तुझ्या निजकोपाग्नीनें जाण। भस्म रावण पैं झाला॥३७॥ एक लोभें जळाला। दुसरा क्रोधाग्नीं आहाळला[२]। त्याचा प्राण सहजचि गेला। रामें वध केला तो काय॥३८॥ वानिसी सेतुबंधनाची ख्याती। पाषाणीं बांधिला अपांपती। स्वयें कष्टला रघुपती। तो केला अगस्तीनें आचमन॥३९॥ जळेंवीण सागरा। शोषिता तया ऋषीश्वरा। जीवनहीन झाली धरा। जळचरां आकांत॥४०॥ स्थळीचें आटतां जीवन। ब्राह्मणांचें संध्यास्नान। सत्कर्मे राहिलीं पूर्ण। क्षुधा सुरगण पीडिले॥४१॥ मग मिळोनियां समस्तीं। विनविलें ऋषीप्रती। सोडोनि मूत्रद्वारें निश्चितीं।अपांपती क्षार केला॥४२॥ ऐसा लोपामुद्रेची वचनोक्ती। ऐकोनि हांसली सीता सती। आपुल्या निजपतीची ख्याती। अगाध कीर्ती सांगसी॥४३॥

अगस्तीच्या करणीने सर्व दुःखी झाल्याचे सीता सांगते : घालोनियां लोटांगणीं। उपहासें बोले जनकनंदिनी। अगाध ऋषीची करणी। विश्वालागूनी दुःखजनक॥४४॥ देव पीडिले क्षुधावर्ती ऋषी सांडवले धर्मस्थिती। प्राणी आहारेंवीण पीडिती। तळमळती जीवनेंवीण॥४५॥ गायी हंबरडा हाणिती। जळचरां प्राणांतवृत्ती। प्राणिमात्रां दुःखप्राप्ती। त्रिजगती हाहाभूत॥४६॥

शब्दार्थ : १. वध करून, २. दग्ध झाला.

कष्टीं प्रार्थितां सुरवर। मुक्त केला तो सागर। तो करोनि सांडिला क्षार। झाला सर्वत्र असेव्य ॥४७॥ असतांही समुद्रतीरीं। तृषा पीडितां शरीरीं। घेवों नये चूळभरी। करी बोहरी जीविताची ॥४८॥ ऐसी ऋषीश्वराची ख्याती। अल्पासाठीं तप:संपत्ती। स्वयें वेंचोनि निमेषगती। स्वयें उरती अभिमानग्रस्त ॥४९॥ आतां श्रीरामाची कथा। जे बोललीस यथार्थता। श्रीराम सर्वथा अकर्ता। कर्तव्यता त्या नाहीं ॥५०॥ जैसें जैसें ज्याचें प्राचीन[1]। त्या त्या कर्मानुरूप जाण। फळदाता रघुनंदन। स्वयें कर्तेपण त्या नाहीं ॥५१॥ आणिक एक अद्‌भुत। श्रीरामाचें आचरित। साधुआज्ञा शिरीं वंदित। ख्याति विख्यात त्रिलोकीं ॥५२॥ तुझ्या स्वामीचें निजमूत्र। जगीं होईल अपवित्र। यालागीं कृपाळु रघुवीर। केलें साचार जगद्वंद्य ॥५३॥ सेतुबंधीं रामतीर्थी। सकृत् स्नानमात्रें मुक्ती। मनें स्मरण जे करिती। ते ते होती नित्यमुक्त ॥५४॥ तुझ्या स्वामीचे मूत्रमहिमे। वंद्य केलें श्रीरामें। ऐकतांचि अगस्तिरमे[2]। विस्मयो परम वर्तला ॥५५॥

मोठ्यांपुढे आपला महिमा सांगणे उचित नव्हे असे सीतेला रामांनी सांगून संतमहिमा वर्णिला: तें ऐकतां रघुनाथ। जानकीतें निवारित। सज्जनापुढें निजकृत। नये निश्चित पैं सांगों ॥५६॥ महंतापुढें निजख्याती। बोलणें हेचि अपकीर्ती। अबले नेणसी निश्चितीं। मौनस्थितीं पैं राहें ॥५७॥ श्रीरामाचें महिमान। जें तूं वानिसी गहन। तें सत्कृपेस्तव जाण। संदेह आन असेना ॥५८॥ पूर्वी मज नेणे कोणी। सज्जनांचे कृपेकरोनी। वंद्य झालो त्रिभुवनीं। विश्व चिंतनीं लागलें ॥५९॥ मज नाहीं रूप नांव। तो मी सत्कृपेस्तव। स्वयें झालो सावयव। चतुर्बाहु मेघश्याम ॥६०॥ मज नांवे हृषीकेशादिक। संतीं ठेविलीं सम्यक। अलंकार कौस्तुभादिक। अर्पिले देख अति प्रीतीं ॥६१॥ मज ठाव नाहीं एके ठायीं। म्हणोनी वैकुंठ रचिलें तिहीं। सिंहासनादि पदवी पाहीं। संतीं तिहीं अर्पिली ॥६२॥

विप्रप्रसादाद्धरणीधरोहं। विप्रप्रसादात्कमलावरोहम्।
विप्रप्रसादाद्विजयो जयोहं विप्रप्रसादान्मम रामनाम ॥१३॥

रमा मुख्य महासिद्धी। संतीं अर्पिल्या भजनविधी। अष्टभोगादि समृद्धी। भोगविधी अर्पिले ॥६३॥ जगीं व्हावया निजमान्य। सज्जनांचा दक्षिण चरण। तेंचि माझें निजभूषण। निजचिन्ह श्रीवत्स ॥६४॥ इतरीं करितां भजनासी। सर्वस्व आपुलें अर्पी त्यांसी। शेखीं अर्पी निजरूपासी। परि श्रीवत्सासी न देववे ॥६५॥ तें नाहीं मजअधीन। जो ब्राह्मणाचा अनन्यशरण। त्यासींच प्राप्ती होय जाण। पदरजें स्नान नित्य करितां ॥६६॥ म्हणोनी जानकिये आपण। ज्याचेनि रजें[3] होय पावन। त्यापुढें निजकीर्तिवर्णन। सर्वथा जाण नये करूं ॥६७॥ ऐसें गुह्य निजप्रीतीसीं। श्रीरामें सांगितलें जानकीसी। तेणें उल्लास झाला तिसीं। संतमहिमेसी ऐकोनी ॥६८॥ लोपामुद्रा संतोषली। तिणें जानकी आलिंगली। तुझेचि धर्मेंकरोनि वहिली। महिमा ऐकिली रामाची ॥६९॥

रामकृत अगस्तिमहिमा : लोटांगणीं अति प्रीतीसी। रामें विनविला अगस्तिऋषी। तुझेनि धर्में विश्वनाथासी। दक्षिणेसीं येणें झालें ॥७०॥ तेणें प्रसंगें जगासीं। दर्शन झालें जोतिर्लिंगासीं। जें अलक्ष बहुकाळेंसी। तेंचि जगासी प्रत्यक्ष ॥७१॥ नव्हे आजकालचें स्थापन। वाळुकालिंग नव्हे जाण। ज्योतिर्लिंग पुरातन। अनुग्रह करोन प्रकट केलें ॥७२॥ रावण शिवाचा निजगण। त्याचें देखोनि उग्र भजन। तेणें होवोन प्रसन्न। निजज्योति जाण अर्पिली ॥७३॥ तें हें रावणानुग्रहें पूर्ण। ज्योतिर्लिंग पुरातन। श्रीशंकरें आपण। जगदुद्धरणा

शब्दार्थ : १. पूर्वसंचित, पूर्वकर्म, २. लोपामुद्रेला, ३. पदधूलीने.

प्रकटिलें ॥७४॥ व्रतहीन तपोहीन। तीर्थहीन दानहीन। स्वधर्मच्युत कर्महीन। होती पावन रामेश्वरीं ॥७५॥ महापापी दुराचारी। केवळ पतित संसारी। त्यांचा उद्धार रामेश्वरीं। दर्शन करितां एकवार ॥७६॥ तुझे कृपेस्तव तत्वतां। येणें झालें श्रीविश्वनाथा। करूनि सेतुबंध सरतां[1]। जगदुद्धारता तुझेनि ॥७७॥ तुवां वसविलें दंडकारण्य। म्हणोनि झालें अति पावन। राक्षसविरोधापासून। केलें मोचन तीर्थाचें ॥७८॥ तुझेनि धर्मेंकरोनि जाण। दंडकारण्य अति पावन। सकळविरोधी रावण। तुझे कृपेंकरोन निवटिला ॥७९॥ ऐसें स्तवोनि अगस्तीसी। आज्ञा पुसतां तयासी। येरीं नमिलें लोटांगणेंसीं। बोलावया आम्हांसीं वदन कैंचें ॥८०॥

अगस्तिकृत राममहिमा : तुझेनि आमुचें उद्धरण। तुझेनि पावन दंडकारण्य। तुझेनि तीर्थां पावनपण। जगदुद्धारण तुझेनि ॥८१॥ लिंगाचें जें पावनपण। तें तुझेनि नामेंकरोन। नामें तीर्थ पावन। जग पावन तुझेनि ॥८२॥ श्रीरामा तुझे नामापरतें। आन पावन नाहीं सरतें। नामें उद्धरती पतितें। जे तीर्थांचेनि बापे न सुटती ॥८३॥ सकळ धर्माचे शेवटीं। कुंटणी वर्णामाजी ओखटी[2]। सकुडी[3] बैसविली वैकुंठीं। पक्ष्यासाठीं श्रीरामा ॥८४॥ विश्वेश्वर काशीप्रती। जें उपदेशी देहांती। चतुर्विध जनां मुक्ती। नामें निश्चितीं पैं तुझ्या ॥८५॥ तो तूं प्रत्यक्ष घनसांवळा। आजि देखिलासे डोळां। सकळ भाग्य आलें फळा। रघुकुळपाळा श्रीरामा ॥८६॥ ऐसें परस्परें जाण। येरयेरांचें करोनि स्तवन। श्रीरामें मागोनि आज्ञापन। केलें प्रदक्षण लिंगासीं ॥८७॥

श्रीरामांनी स्वतःच्या नावाचे नगर बसवून ते ब्राह्मणांना दान दिले : जनस्थानीं मुनिवरां। वसवावया रघुवीरा। मानसीं कळवळा पुरा। करीं विचारा निर्वाहीं ॥८८॥ दंडकारण्यीं ऋषिगण। अति साधु गोब्राह्मण। मननशील ब्रह्मसंपन्न। आहारेंवीण पीडती ॥८९॥ मागों नेणती सर्वथा। अयाचितां[4] कैंचा दाता। त्यांच्या अन्नाची संस्था। करावी तत्वतां आर्जीचि ॥९०॥ म्हणोनि निजनामें नगर। रामें वसवोनि रामपुर। ब्राह्मणां दिधलें अग्रहार[5]। ऋषीश्वरनिर्वाहो ॥९१॥ तें श्रीरामाचें आज्ञोत्तर। ब्राह्मणांचे वृत्तिक्षेत्र। राजीं पाळिले उत्तरोत्तर। अवधि द्वापरापर्यंत ॥९२॥

कलियुगांतील एका राजाने रामाज्ञा मोडून ब्राह्मणांचे ते नगर हिरावून घेतलें : पुढें कलियुगाचे नृपतीं। श्रीरामआज्ञा बहुतीं। स्वयें पाळिली यथास्थितीं। कोणाएकाची वृत्ती क्षोभली ॥९३॥ विकल्प धरोनियां मना। राजभाग ब्राह्मणां। मागों आदरिलें जाणा। न देतां दंडणा करूं पाहे ॥९४॥ शीघ्र आणा कारभार। अथवा दाखवावें पत्र। तुम्हांसीं कोणीं अग्रहार। दिलें सत्वर सांगावें ॥९५॥ अन्यथा करोनि दंडन। पूर्वी भक्षिलें आणवीन। वचन ऐकतां ब्राह्मण। झाले उद्विग्न अति दुःखी ॥९६॥ परंपरागत अग्रहार। आम्ही खातों उत्तरोत्तर। वडिलीं कोठें ठेविलें पत्र। नाही गोचर[6] आम्हांसी ॥९७॥ अन्न श्रीरामदत्त। वार्ता ऐकों दिवस बहुत। पत्राचा काय जो झाला अर्थ। आम्ही निश्चित जाणूंना ॥९८॥ म्हणोनि झाले चिंतातुर। तंव दूत ओढती सत्वर। तेणें आकांत झाला थोर। द्विजवर अति दुःखी ॥९९॥

त्या ब्राह्मणांकडून श्रीरामांचा धांवा: श्रीरामकृत सरोवर। नगराबाहेर सविस्तर। तेथें जावोनि समग्र। मरणा तत्पर बैसले ॥१००॥ मागील दिवसांचा समग्र। किती द्यावा कारभार। पुढें केंवी भरे दुर्भर[7]। मरणा तत्पर यालागीं ॥१॥ विषप्रयोग करोनि देख। प्राण सांडणें आवश्यक। म्हणोनि मिनले सकळिक। विचार आणिक असेना ॥२॥ अंध पंगु मुके दीन। दरिद्रदोषें आचारहीन। ऐसियांतें रघुनंदन। सर्वथा जाण नुपेक्षी ॥३॥ तो आम्हांलागीं उदासभूत। कां

---

**शब्दार्थ :** १. श्रेष्ठ, २. नीच, ३. देहासहित, ४. न मागणाऱ्यांना, ५. इनामगाव, ६. ठाऊक, ७. मोठा कठिण.

झाला रघुनाथ। कां उपेक्षिलें निजव्रत। म्हणोनि अनाथ सांडिलों॥४॥ जेणें वेदांचा उद्धार केला। ग्राहग्रस्त[1] गज सोडविला। अंबरीषालागीं पावला। त्याचा सोशिला जन्मभार॥५॥ हिरण्याक्षें अवनी। नेतां आणिली तो निवटोनी। प्रल्हादाच्या व्यथा देखोनी। स्तंभ फोडूनी प्रकटला॥६॥ सहस्रार्जुन होवोनि प्रबळ। गोब्राह्मणादि सकळ। पीडिता झाला बहुकाळ। तो निवटी तत्काळ परशुधर॥७॥ रावण होवोनि प्रबळ। बंदी घातले सुर सकळ। त्यांची देखोनि कळवळ। रघुकुळपाळ पावला॥८॥ वेगीं येवोनि वनांतरा। संहार केला निशाचरां। शिळीं बुजोनि सागरा। केलें वानरां जगद्वंद्य॥९॥ निवटोनि लंकानाथ। सुर सोडविले समस्त। संस्थापिला शरणागत। कीर्ति अद्भुत तिही लोकीं॥११०॥ ऐसीं अनंत चरित्रें। ज्यांची पुराण वाखाणितें। तेणें मोकलिलें रघुनाथें। निजअंकितें विसरला॥११॥ कैंचें आम्ही दावूं पत्र। कोठोन देऊं करभार। दीनदयाळ रघुवीर। ती ब्रीदें[2] समग्र काय झालीं॥१२॥ धंव पाव गा रघुवीरा। म्हणोनि आक्रंदती सैरां। नेत्रीं अश्रूंचिया धारा। दीर्घस्वरें रूदन करिती॥१३॥

धावा ऐकून मारुतिराय रक्षणासाठी आले : तें न साहेचि वायुसुता। श्रीरामाज्ञा उल्लंघिता। त्याच्या करीन मी निःपाता। म्हणोनी हनुमंत पातला॥१४॥ लहानथोर देखातां जन। आधीं पत्र देवों काढून। तें न मानी तरी दंड करीन। निःसंतान होय जेणें॥१५॥ ब्राह्मणांच्या वृत्तीचें[3] हरण। त्यावरी श्रीरामदत्त जाण। श्रीरामाचे कृपेंकरोन। करीन शासन मी त्यांसीं॥१६॥ अधर्मशीळ नृपवर। ते केवळ पैं तस्कर। मी श्रीरामाचा किंकर। दंड साचार करीन॥१७॥ म्हणोनि सकळां लोकांदेखत। क्रोधें पातला हनुमंत। ब्राह्मणा आश्वासोनि तेथ। उडी सरोवरांत घातली॥१८॥

मारुतीने सरोवरातून रामाज्ञा कोरलेली शिळा त्या ब्राह्मणांना दिली : पवनपुत्र आतुर्बळी। उडी घालोनि तत्काळीं। महाशिळा बाहेर काढिली। टाकून दिधली द्विजांपुढें॥१९॥ तेणें चमत्कारिले सकळिक। कैंचा वानर एकाएक। येवोनि बुडी दिधली देख। शिळा अलोलिक काढिली॥१२०॥ ऐसे मिळोनि समग्र। अवघे झाले आश्चर्यपर। एक म्हणती कायसा विचार। शिळा सत्वर पैं शोधा॥२१॥ म्हणोनियां सकळीं। शिळा धुवोनि शुद्ध केली। तंव तेथें अक्षरें भर्ली। वरी देखिली नागरें[4]॥२२॥ तंव हरिखले सत्वर। श्रीरामें पाठविला वानर। काढून दिधलें शासनपत्र। श्रीरघुवीर कृपाळु॥२३॥ त्याचें करोनि प्रतिलेखन। करावया राजदर्शन। सकळ निघाले मिळोन। श्रीरघुनंदनप्रतापें॥२४॥ समें वांचविलें आम्हांसी। म्हणोनि आनंद सकळांसी। निघाले अति आनंदेंसीं। वृत्त रायासी सांगावया॥२५॥

त्या राजाला तो शिलालेख दाखविला. त्याला आनंदः पत्राचेनि अति हरिखें। येवोनि रायाजवळिकें। पत्र दाविती कौतुकें। पहावें विवेकें करोनी॥२६॥ परंपरा श्रीरामदत्त। आम्ही सेवितों काळ बहुत। तें पत्र पुसतां स्वामिनाथ। वेंगीं हनुमंत पातला॥२७॥ घालोनि सरोवरीं उडी। शासनपत्र तांतडीं। काढोनियां लवडसवडी[5]। अति निर्वडी[6] पाठविलें॥२८॥ ऐसें द्विजांचें उत्तर। ऐकतांचि नृपवर। झाला अत्यंत आल्हादपर। मस्तकीं पत्र वंदिलें॥२९॥ मन ठेवोनि श्रीरामभक्तीं। अति नम्र अत्यंत प्रीतीं। पत्र वाची नृपती। सावध श्रोतीं परिसावें॥१३०॥

सामान्योऽयं धर्मसेतुर्नराणां काले काले पालनीयो महद्भिः।
सर्वानेतान्भाविनः पार्थिवेंद्रान् भूयो भूयो याचते रामचंद्रः॥

श्रीरामाज्ञेचा शिलालेख : भूमंडळींचे नृपवर। युगानुयुगीं उत्तरोत्तर। त्यांसी माझा नमस्कार।

शब्दार्थ : १. मगराने पीडित, २. कीर्ती, ३. उपजीविकेचे, ४. सुंदर, ५. सत्वर, ६. निश्चयाने.

प्रीतिपुरस्कर विनंतीसीं ॥३१॥ माझें नाव दाशरथी। सूर्यवंशी रघुपती। सकळीं मिळोनि माझी विनंती। भावें नृपतीं पाळावी ॥३२॥ सकळावरोधी दशशिरी। पीडूं आदरिली धरत्री। यासी निवटावया झडकरी। सेतु सागरीं बांधिला ॥३३॥ आणोनियां महापाषाण। सेतु बांधिला निमेषेंकरोन। सोडवोनियां सुरगण। दशानन निवटिला ॥३४॥ तेणें काळें चराचर। सकळ त्रैलोक्यीं सुख निर्भर। सेतुबंधीं रामेश्वर। जगदुद्धार करीतसे ॥३५॥ त्याहूनि हा पावन। धर्मसेतु अति गहन। ब्राह्मणांसी क्षेत्रदान। निर्वाहार्थ जाण दीधलें ॥३६॥ तेथील भक्षोनियां अन्न। द्विज करिती वेदाध्ययन। वेदघोषें जन पावन। श्रीनारायण संतुष्ट ॥३७॥ क्षत्रियांचा धर्म नव्हे। जे याञ्चा करावी स्वयें। तरी द्विजकार्यालागीं पाहें। याचिताहें तुम्हांप्रति ॥३८॥

ब्राह्मणांच्या सेवेचे महिमान: जें ब्राह्मणांचें वृत्तिहरण। सर्वथा न करावें आपण। तेणें सकळ कुळा कल्याण। सुख गहन पावती ॥३९॥ तेचि धन्य नृपवर। ज्यांसीं द्विजसेवा निरंतर। त्यांच्या निर्वाहीं तत्पर। अत्यादर जयांसी ॥१४०॥ देखतां द्विजसंकटासी। सर्वांग ओढवी उल्लासीं। पार नाहीं त्याच्या भाग्यासीं। हें निश्चयेंसीं अवधारा ॥४१॥ हेंचि भगवंताचें व्रत। द्विजसेवा इथंभूत। त्यांचा निर्वाहो निश्चित। स्वयें करित निजांगें ॥४२॥ याचिलागीं अवतारमाळा। स्वयें धरणें घननीळा। दुष्ट निवटोनि सकळा। द्विजकुळा रक्षावें ॥४३॥ जो द्विजद्वेष करी। तोचि भगवंताचा वैरी। त्यासी निवटावया निर्धारीं। आयुधें धणी चक्रादि ॥४४॥ जा करी द्विजवृत्तिहरण। दंडी अभिशापेंकरोन। धूर्तवादें ठकून । नागवी ब्राह्मण धनलोभें ॥४५॥ त्याचें सकळ नि:संतान। स्वयें करी भगवान। स्वर्गस्थ जे पितर जाण। त्यांसीही पतन तत्काळ ॥४६॥ वाचा मनें धरादान। स्वयें दिधलें आपण। त्याचें करितां अभिलाषण[1]। स्वयें भगवान क्षोभेल ॥४७॥ अथवा जें कां परदत्त। आपला संबंध नाहीं जेथ। त्याचेनि अभिलाषें निश्चित। होईल घात नवल काय ॥४८॥ याकारणें पुढतपुढती। भावी जे कां भूपती। विनवीत असें त्यां अति प्रीतीं। पुढील निश्चितीं होतील जे ॥४९॥ तिहीं परिसोनि विनंती। स्वयें मानावी निश्चितीं। सांडूनि लोभाची आसक्ती। ब्राह्मणभक्ती करावी ॥१५०॥ लोभें ऐहिकीं न मानी कोणी। लोभें निंद्य होइजे जनीं। लोभें परलोकाची हानी। निंद्य पतनीं पडे लोभें ॥५१॥ वंचोनि उत्तम लोकासीं। लोभें होइजे नरकवासी। म्हणोनि निर्लोभ मानसीं। द्विजसेवेसी करावें ॥५२॥ निर्विकल्प निर्लोभ पूर्ण। तोचि माझा पढियंता[2] जाण। ऐसें श्रीरामाचें वचन। पत्रावरून परिसिलें[3] ॥५३॥ देखतांचि पत्राक्षरें। आश्चर्यवंत समग्रें। कृपा केली रघुवीरें । राखिलें द्विजवरें आकांती ॥५४॥

रामाज्ञावाचून त्या राजाने आदराने त्या ब्राह्मणांना त्यांचे राज्य दिले : शिरीं वंदोनियां पत्रासी। आज्ञा दिधली। द्विजांसी। सुखें जावें निजनगरासी। श्रीरामदत्तासी सुखें भोगा ॥५५॥ कोणी करील विपरीत। त्याचा मी करीन घात। ऐसें बोलतां नृपनाथ। ब्राह्मण हर्षयुक्त निघाले ॥५६॥ संकटीं सोडविलें आकांतासीं। म्हणोनि आनंद सकळांसी। आतां जावोनि नगरासी। हनुमंतासीं करूं पूजा ॥५७॥ सकळ वृत्तांत पुसों त्यासी। तुझा वास कोणे देशीं। पुनरपि ओढवल्या विघ्नासी। केंवी भेटसी स्वामिया ॥५८॥

ते ब्राह्मण त्या सरोवरावर मारुतीच्या भेटीसाठी आले; परंतु भेट झाली नाही: ऐसा करोनि संप्रधार[4]। द्विज निघाले वेगवत्तर। ठाकोन आले सरोवर। हनुमान वीर न देखती ॥५९॥ अबळें[5] ब्राह्मणें निश्चितीं। न भेटतांचि शीघ्रगती। भुलोनि गेली विषयप्रीतीं। नोळखिती

शब्दार्थ : १. इच्छा, २. आवडता, ३. ऐकिले, ४. निश्चय, ५. दुर्बळ.

सज्जना ॥१६०॥ द्रव्यलोभें जो भुलला। अथवा कामातुर झाला। विषयविघातें पडला। निमग्न झाला चिंतेसीं ॥६१॥ त्याची बुद्धि अंध झाली। हिताहित न देखे वहिली। विषयगतीं बुडोन गेली। कांहीं केल्या उपडेना ॥६२॥ स्वस्थ असावें बुद्धीसीं। तरी जाणावें निजहितासी। कोण ओळखे निजसज्जनासी। हनुमंतासी कोण पुसे ॥६३॥ पत्र देखोनि तांतडीं। संतोषाची उभवोनि गुढी। राजभेटी लवडसवडी। द्विजवर पैं गेले ॥६४॥ मागें सरोवरीं हनुमंतें। प्रकाशावया तीर्थमहिमेतें। प्रतिष्ठिलें राममूर्तीतें। त्याच्या नामातें परिसावें ॥६५॥ दानउदार रघुपती। याचक देखतां निश्चितीं। देतां बहु न मने चित्तीं। अद्‌भुतशक्ती पैं देणें ॥६६॥ म्हणोनि नामगौरव। हनुमान म्हणे उदार राघव। तेंचि अभिधान स्वयमेव। उत्तरोत्तर चिंतिती ॥६७॥ ब्राह्मणांचे हृदयीं जाण। चिंताताप अति दारुण। सबळ वाढला होता संपूर्ण। त्याचें निरसन पैं झालें ॥६८॥ म्हणोनि यासीं अभिधान। सरोवर हृदयतापनाशन। तीर्थ विख्यात पावन। अद्यापि जाण वर्णिती ॥६९॥ तेथें करेनियां स्नान। उदार रामाचे दर्शन। सद्‌भावें करितां संपूर्ण। निश्चळ मन पैं होय ॥१७०॥ द्वंद्वदुःख पैं त्रिशुद्धी[१]। निरसोनिया आधिव्याधी। समाधान निजानंदीं। कीर्ति अगाधी हनुमानाची ॥७१॥

तेथून श्रीराम विमानातून पुढे निघाले : येरीकडे रघुनंदन। नमोनी सकळ ऋषिगण। विमानीं करोनि आरोहण। सत्वर जाण चालिला ॥७२॥ अति प्रीतींकरोनि नमन। श्रीराम आरूढतां विमान। जयजयकार जाहला पूर्ण। नादें त्रिभुवन कोंदलें ॥७३॥ पूर्वानुक्रमें रघुपती। विमानीं बैसतां निश्चितीं। विमान उसळलें अंतरिक्षस्थितीं[२]। शीघ्रगतीं आकाशीं ॥७४॥ विमानासरसीं किराणें। देत उडालीं वानरगणें। भार[३] चालिले पैं गगनें। लाजिला पवन उड्डानासीं ॥७५॥ भुभुःकार वानरांचें। माजी उच्चारण नामाचें। जयजयकार सिद्धांचें। चरित्र रामाचें वर्णिती ॥७६॥ गगनीं चालतां विमान। मागुतेनि रघुनंदन। जानकीतें हातीं धरून। निजचरित्र जाण सांगत ॥७७॥ तूं ऐकें जानकी सुंदरी। तुझेनि वियोगे दुःख भारी। मी हिंडलो गिरिकंदरीं। निजनिर्धारीं तें ऐक ॥७८॥

एष विंध्याभिधः शैलो नदीनदसमन्वितः। एषा मे दृश्यते सीते किंष्किधा चित्रकानना ॥५॥
सुग्रीवनगरीं रम्या वाली यत्र हतो मया। एतन्माल्यवतः श्रृंगं किर्ष्किधोपरि भास्वरम् ॥६॥

सुग्रीवभेटीपासून सीताहरणापर्यंतचा कथाभाग राम सीतेला सांगतात : पैल किष्किंधाभवन। फळीं पुष्पी मंडित वन । वाळी बळियाढा दारुण। त्याचें भवन जानकिये ॥७९॥ बंधूची हिरोनि कामिनी। राज्य करी किष्किंधाभवनीं। वरमदें उन्मत्त होवोनी। बंधूलागोनि दवडिलें ॥१८०॥ विध्वंसोनि त्या वरदासी। बाणें निवटोनि वाळीसी। दारेसहित राज्यासी। क्षणार्धेसीं हरितलें ॥८१॥ सोडविली सुग्रीवपत्नी। हरितली वाळीची राणी। दोन्हीं सुग्रीवासी देवोनि। राज्याभिषिंचनीं गौरविला ॥८२॥, तेणें उपकारें दाटला। वानरभार घेवोनि आला। मातें सर्वस्वें विनटला। वर्तो लागला ममाज्ञा ॥८३॥ व्रतें धरोनि दुर्धर्ष[४]। राहिलों प्रस्रवणगिरीस। स्वयें देखतां पर्वतास। येथें चातुर्मास्य क्रमियेलें ॥८४॥ पुढें पाहें पंपासरोवर। जेथें भेटले वानरवीर। पुढें शबरीस्थान पवित्र। जे म्यां सत्वर उद्धरिली ॥८५॥ पैल शरभंग ऋषीची पर्णकुटी। जे तुवांहि देखिली दृष्टीं। धिक्कारोनि ब्रह्मसृष्टी। उठाउठीं उद्धरिला ॥८६॥ आमुचा आश्रम पंचवटीं। जेथें येवोनि रावण कपटी। तुज वाहोनियां पाठीं। हरण गोरटी पैं केलें ॥८७॥

---

शब्दार्थ : १. खरेपणाने, २. आकाशमार्गाने, ३. समूह, ४. कठिण.

ऐसें अति प्रीतीं रावणारी[१]। सांगता जानकी सुंदरीं। तंव विमान गगनांतरीं। त्वरेंकरीं चालिलें ॥८८॥ सांडूनि मलयाद्रिशेषाद्री। प्रस्रवणादि सिंहाद्री। महादेवाचा ब्रह्माद्री। आनंदगिरी ओलांडिला ॥८९॥ जेथें अत्रि आणि अनसूया। स्वयें भेटले रघुराया। अनुग्रहिली[२] रामजाया[३]। जाणोनियां भविष्य ॥१९०॥ तो सांडोनि आनंदगिरी। विमान चालिले झडकरी। क्षणें ओलांडिला विंध्याद्री । अति मनोहरी शोभा ज्याची ॥९१॥

असौ सुतनु शैलेन्द्रश्चित्रकूटः प्रकाशते। यत्र मां कैकयीपुत्रः प्रमोदयितुमागतः।

चित्रकूटावरील भरतभेटीची माहिती : सुमध्यमे सुमंगले। ऐक जानकिये वेल्हाळे। आम्हां भेटावया प्रेमळे। दोघेही आले कैकयीपुत्र ॥९२॥ करोनि पितृकार्य पिंडदान। कष्टी बोळविले दोघे जण। तो हा चित्रकूटपर्वत जाण। निवासस्थान आमुचें ॥९३॥ पैल मंदाकिनी पुण्यसरिता । वंद्य ब्रह्मांदिका समस्तां। जियेचा शिंतोडा लागतां । उद्धार तत्वतां जड जीवां ॥९४॥ अंतरिक्ष असतां विमानीं। तळीं दिसे सकळ अवनी। देखोनियां राजधानी[१]। जानकीलागूनी सांगत ॥९५॥ आमुचे आप्त अत्यंतर। वाल्मीक भरद्वाज मुनिवर। यांचे आश्रम मनोहर। पैल सुंदर देखत ॥९६॥ गंगा यमुना अति विख्यात। माजी सरस्वती अति गुप्त। गुहक आमुचा निजभक्त। नगर विख्यात दिसे त्याचें ॥९७॥ जेथें एक रात्र राहून। बोळविला सुमंत प्रधान। तें हें गुहकनगर जाण। अति पावन जानकिये ॥९८॥

एषा सा दृश्यते सीते राजधानी पितुर्मम। अयोध्या कुरु वैदेहि प्रणामं पुनरागता ॥८॥

ततस्ते वानराः सर्वे राक्षसाः सबिभीषणाः। उत्प्लुत्योत्प्लुत्य ददृशुस्तां पुरीं शुभकाननाम् ॥९॥

अयोध्यादर्शनाने सर्वांना आनंदीआनंद : त्याहूनि पुढे अलोलिक। राजधानी अति सम्यक। पैल दिसत असे देख। आमुचा जनक जेथ होता ॥९९॥ ते हे देखतां अयोध्यानगरी। अति मंडित माड्यागोपुरी। पताका तोरणें चौफेरीं। अति कुसरीं शोभत ॥२००॥ पैल देख राजभुवन। अति मंडित सिंहासन। नित्य जेथें दशरथारोहण। करीं नमन तयासीं ॥१॥ ऐकोनीं श्रीरामवचन। जानकी झाली आनंदघन। केलें साष्टांगीं नमन। करसंपुट जाण जोडोनी ॥२॥ तें देखोनि सौमित्र। झाला अत्यंत आल्हादपर। केला सांष्टांग नमस्कार। हर्ष थोर उथळला ॥३॥ देखोनियां सिंहासन। श्रीरामें घातलें लोटांगण। आनंद उथळला संपूर्ण। वानरगण हरिखले ॥४॥ अयोध्येचें आराम[३] गहन। वनें उपवनें विश्रामस्थान। देखोनियां वानरगण। करिती गर्जन रामनामें ॥५॥ देतीं उलटीं किराणें। नामें गर्जती दीर्घस्वनें[४]। नाचतातीं वानरगणें। बिभीषणासमवेत ॥६॥ येरयेरां क्षेम[५] देती। येरयेरां नमस्कारिती। विजयी होवोनि रघुपती। अयोध्येप्रती स्वयें आला ॥७॥ एका जनार्दना शरण। पुढें कथा अति गहन। श्रीरामभरताचें दर्शन। श्रोते अवधान देती स्वयें ॥२०८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धाकांडे एकाकारटीकायां श्रीरामअयोध्यादर्शनं नाम सप्तसप्ततितमोऽध्यायः ॥७॥ ओंव्या ॥ २०८॥ श्लोक ॥९॥ एवं ॥२१७॥

---

शब्दार्थ : ५. श्रीराम. ६. उपदेशिली. १. जानकी, २. आपले नगर, ३. विश्रांतिस्थाने, ४. मोठ्या आवाजाने, ५. आलिंगन.

# अध्याय अठ्याहत्तरावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

## हनुमंत नंदिग्रामास गेला

भरद्वाज ऋषींनी श्रीरामांचे विमान पाहिले : विमानीं बैसोनी रघुनाथा । अति त्वरान्वित जातां । तळीं भरद्वाज अवचितां । आश्रमीं असतां देखिला ॥१॥ आश्रमीं असतां भरद्वाज ऋषी । आश्चर्य देखिलें आकाशीं । हेमच्छाया[1] दशदिशीं । चौपासीं पसरली ॥२॥ रविचंद्रांतें लाजवीत । प्रकाश शीतोष्णातीत । गगनीं काय असे जात । ऋषि मनांत विचारी ॥३॥ निर्धारोनि पाहे नयनीं । तंव परिवारला वानरगणीं । श्रीराम देखिला विमानीं । जनकनंदिनी अंकावरी ॥४॥ सौमित्रासहित राम होये । सर्वे वानर कैंचे हो हे । राक्षसगणही दिसती पाहें । श्रीराम होये सर्वथा ॥५॥ माझ्या श्रीगुरूच्या अनागता । श्रीराम न करी अन्यथा । निवटूनियां लंकानाथा । शरणागता स्थापिलें ॥६॥ होय तो शरणागत पूर्ण । राक्षसांमाजी बिभीषण । हनुम्यासहित सुग्रीव जाण । वानरगणसमवेत ॥७॥ ऐसें श्रीरामाचें निजविमान । निजगुरूच्या भाष्यावरून । परीक्षा करोनियां पूर्ण । गुणाकार[2] पूर्ण पाहिला ॥८॥

**पूर्णे चतुर्दशे वर्षे पंचम्यां भरताग्रजः । भरद्वाजाश्रमं प्राप्य ववंदे नयतो मुनिम् ॥१॥**
**गोत्रं नाम समुच्चार्य राघवः सहलक्ष्मणः । प्रणतं राघवं दृष्ट्वा सानुजं पुनब्रवीत् ॥२॥**

विमानातून जाणाऱ्या रामांना स्वतःची ओळख देऊन भरद्वाजांनी आश्रमात बोलाविले : माघ शुद्ध पंचमीपासून । वर्ताळा करितां लेखन । तंव चौदा वर्षें जाहलीं पूर्ण । व्रत संपूर्ण पैं झालें ॥९॥ ऐसा निश्चय मानोनी मनीं । रामसौमित्र लक्षूनी । लोटांगण घालूनी । अति प्रीतीकरोनी विनवीत ॥१०॥ भरद्वाजगोत्रोत्पन्न । भारद्वाज माझें अभिधान । श्रीरामा तुज अभिवंदन । दीनवचन परिसावें ॥११॥ स्वस्तिक्षेम विजययात्रा । केली निवटोनि दशवक्त्रा । तेणेंकरोनि रघुवीरा । चराचरां आनंद ॥१२॥ परम भाग्याचे आम्ही पूर्ण । जे पुनरागमनीं रघुनंदन । नयनीं देखिला संपूर्ण । सकळानुष्ठान फळा आलें ॥१३॥ तूं दीनाची माउली । आर्तश्रांताची साउली । निजजनां कल्पवल्ली । कृपा ओलावली तुझेनि ॥१४॥ तूं शरणागता शरण्य । आर्तबंधु आर्तत्राण[3] । मी तुझें निजदीन । करीं पावन आश्रम माझा ॥१५॥ आश्रमा तुझें आगमन । तेणें सकळ कृतकल्याण । धर्मानुष्ठानाचें फळ पूर्ण । तुझे श्रीचरण देखोनी ॥१६॥ तुझेनि पावन आश्रम । तुझेनि पावन स्वधर्म । तुझेनि पावन स्वकर्म । सर्वोत्तम तुझेनि आम्ही ॥१७॥ घालोनियां लोटांगण । अत्यंत प्रीतीं रघुनंदन । विनवितांचि स्वयें जाण । आला ठाकून प्रेमभावें ॥१८॥ श्रीराम प्रेमाचा पाहुणा । राम प्रेमाचा अंकित जाणा । प्रेमाचे पडिभरें[4] पूर्णा । न म्हणे आपणा कुळजाती ॥१९॥ हा तरी द्विज वर श्रेष्ठ । ऋषीश्वरांमाजी वरिष्ठ । भजनयुक्त स्वधर्मनिष्ठ । प्रेम उद्भट त्याहीवरी ॥२०॥ ऐसियाचें उपेक्षण । सर्वथा न करी रघुनंदन । तळीं उतरिलें विमान । सेवकजनसमवेत ॥२१॥

---

शब्दार्थ – १. सुवर्णाची सावली, २. हिशोब, ३. पीडितांचा रक्षणकर्ता, ४. आसक्तीने.

श्रीराम व भरद्वाजांची भेट : येरें घातलें लोटांगण । केले साष्टांग नमन । वेगें श्रीराम उचलोन। धरी आलिंगून हृदयेसीं ॥२२॥ श्रीरामें देतां आलिंगन । उडालें शून्याचें शून्यपण । देह झाला चैतन्यघन । जीवशिवपण नाठवे ॥२३॥ तैसेंचि श्रीरामासीं पूर्ण । देतां ऋषीसीं आलिंगन । श्रीरामा नाठवे रामपण । आनंद पूर्ण उथळला ॥२४॥ गूळ भेटे गोडियेसीं । ऋषिरामांची भेटी तैसी । येरामाजी येरू परिसेयीं । निजउल्लासीं निमग्न ॥२५ ॥ तया सुखाचे जाणते । दुजेपण कैचें पाहतें । टकमक झाली सकळातें । चेतवी तेथें कोण कोणा ॥२६॥ तेणें काळें रघुनाथ । आपण आपणा सावध करित । एकाकी न रमते स द्वितीयमैच्छत । सत्य श्रुत्यर्थ केला रामें ॥२७॥ आपल्या आपण भक्तिसुख । स्वयें भोगावें सम्यक । देव भक्त हावोनी एक । आलिंगन देख सोडिलें ॥२८॥ सुटतां दोघांचें आलिंगन । सर्वदा नाहीं दोन्हीपण । तेणेंचि भावें श्रीरामगण । बिभीषणादि नमियेले ॥२९॥ जें सुख श्रीरामभेटीसीं । इतरां आलिंगन तेणेंचि भावेंसीं । सर्वथा भेद मानसीं । न दिसे बुद्धीसीं एकत्वें ॥३०॥ श्रीराम आणि सौमित्र जाण । सुग्रीवादि बिभीषण । हनुम्यालहित वानरगण । आलिंगिले श्रीरामभावें ॥३१॥ मांडिलें प्रीतीं पूजाविधान । विष्टरयुक्त[१] वरासन[१] । बैसवोनी रघुनंदन । षोडशोपचारीं पूजिला ॥३२॥ तैसेचि सकळ सेवक । बिभीषणादि प्रमुख । भरद्वाजें एकाएक । अति सम्यक पूजिले ॥३३॥

भरद्वाजांकडे भोजन करण्यास रामांचा भरताकरिता विनम्र नकार : पुसे भोजना आज्ञापन । तें न मानीच रघुनंदन । कांही नेदीच प्रतिवचन । तेणें ऋषिवर जाण सचिंत ॥३४॥ ऋषि देखोनि चिंताक्रांत । विनविता झाला रघुनाथ । क्षमा करावी भोजनार्थ। प्रसन्नचित्त होवोनियां ॥३५॥ भरत उपवासीं मजवीण । त्यजिला आहार जीवन । व्रत अंगीकारोनि दारुण । वनवास पूर्ण घेतला ॥३६॥ राजधानी सांडोनियां दूरी । वल्कलांबर जटाधारी । भूमिशायी निरंतरी । व्रतधारी पैं झाला ॥३७॥ त्यासीं सांडोनि आपण । चौदा वर्षेंपर्यंत जाण । सर्वथा नाहीं घेतलें अन्न । आजीच भोजन केंवी करणें ॥३८॥ तुम्ही साधु सर्वज्ञ । निजचित्तीं विवंचून । मज द्यावें आज्ञापन । तेंचि वचन मज वंद्य ॥३९॥ म्हणोनि श्रीरामें आपण । ऋषीस घातलें लोटांगण । तेणें ऋषि विस्मयापन्न । स्वयें रघुनंदन नमियेला ॥४०॥ पूर्णब्रह्म रघुनंदन । स्वयें असोन आपण । वाढवीत भक्तमहिमान । दीनजनकृपाळु ॥४१॥ अहं भक्तपराधीन । ऐसें श्रुतिशास्त्रपुराण । तें दाविलें साच[२] करोन । भक्त महिमान वाढविलें ॥४२॥ राम भक्तांचा अंकिला । राम भक्तांचा विकला । राम भक्तांचा केला । सत्वर या बोला आणिलें रामें ॥४३॥

निदान फळाहार तरी करावा अशी भारद्वाजांची रामांना आग्रहाची प्रार्थना : ऐसी करोनियां विनवण । ऋषीनें प्रार्थिला रघुनंदन । फळाहारा आज्ञापन । द्यावें आपण पैं स्वामी ॥४४॥ म्हणोनि विनविला रघुपती । तेणें संतोषला निश्चितीं । स्वयें गनोनियां विनंती । निजचित्तीं विवंची ॥४५॥ विरक्त ब्राह्मण तपोधन । कष्टी फलाहारालागून । होऊं पाहे खेदक्षीण । याचे सूचन करावें ॥४६॥

रामांची मूकसंमती. सर्व वनस्पती रसपूर्ण झाल्या : ऐसें निजचित्तीं राघवें । धरितांचि निजस्वभावें । वनस्पती सर्वभावें । जीवें भावें वोळल्या ॥४७॥ सर्वऋतु सर्व काळ । एकें वेळें वोळले

---

शब्दार्थ - १. दर्भासन, २. सत्य.

सकळ । वनस्पती फळ मूळ । रसकल्लोळ वोळला ॥४८॥ शुष्कें वोळलीं रसभारें । अफळें दाटलीं फळसंभारें । खाकरें होतीं जीं नि:सारें । तीं कोमळांकुरें लसलसलीं ॥४९॥ सजीव निर्जीव तरुवर । अमृतरसें पैं समग्र । अवघे वोळले एकत्र । बाप रघुवीर कृपाळु ॥५०॥ सरसें विरसें नीरसें । अवघीं वोळलीं ब्रह्मरसें । लाघव केलें राघवेशें । मुनि संतोषें वसावया ॥५१॥ हा अर्थ नेणोनि मुनी । राम विनविला फळभोजनीं । ऋषिवचना संतोषोनी । मस्तकीं मानी श्रीराम ॥५२॥

अर्घ्यं च प्रतिगृण्हीष्व श्वोऽयोध्यायां गमिष्यसि । तस्य तच्छिरसा वाक्यं प्रत्यगृण्हात्स राघवः ॥३॥

श्रीराम भरद्वाजांची पूजा स्वीकारून प्रसन्न झाले : स्वामी श्रीरामा परियेसीं । आतां गेलिया अयोध्येसीं । मागुता निजप्रीतीं देखिजेसी । ऐसें कोणासीं भाग्य आहे ॥५३॥ हातींचा श्रीराम गेलिया । पुनरपि भेटेल गोष्टी वांया । संतोष मानी तो गिळिला माया । निजात्मघात स्वयें केला ॥५४॥ यालागीं रघुनंदना । कृपा करावी दीनजनां । यथाशक्ति पाद्यार्घ्य जाणा । केलें तें प्रीतीनें अंगीकारीं ॥५५॥ ऐसी प्रीतिपूर्वक विनवण । ऐकोनियां रघुनंदन । अंगीकारिली प्रीतिकरोन । दीनजनकृपाळु ॥५६॥ फळें आणावया ऋषीश्वर । शिष्य धाडी जंव सत्वर । तंव आश्रम मनोहर । पुष्पीं अपार लगडला ॥५७॥ सजीव निर्जीव वनस्पती । अमृतरसें वर्षताती । पाषाण तेही द्रवती । श्रीरघुपतिनिजकृपा ॥५८॥ तेणें अति संतोष मानसीं । श्रीरामें कृपा केली ऐसी । आश्रमचि रामपूजेसीं । सकळ सिद्धीसीं वोळला ॥५९॥ फळें तोडोनि अति प्रीतीं । ऋषीनें आणिलीं शीघ्रगतीं । सहित वानरांच्या पंक्ती । श्रीरघुपति सुखावला ॥६०॥

वर देण्याची रामांची इच्छा : विधियुक्त फळभोजन । ऋषीनें संपादिलें पूर्ण । तेणें संतोषला रघुनंदन । माग वरदान म्हणे द्विजा ॥६१॥ ऐकोनि वरदाचें वचन । ऋषि संतोषीं निमग्न । घालोनियां लोटांगण । काय आपण विनवित ॥६२॥ ऐकें स्वामी रघुनाथा । तंवचि वासनेची वार्ता । तंवचि मागणियाची कथा । जंव भेटी तत्वतां नाहीं तुझी ॥६३॥ तंवचि आटाआटी साधनांची । तंवचि खटपट तीर्थांची । तंवचि उठाउठी व्रताची । भेटी रामाची जंव नाहीं ॥६४॥ तंवचि वासना अनिवार । तंवचि मनाचा महामार । तंवचि इंद्रियें दुर्निवार । जंव रघुवीर न देखती ॥६५॥ तंवचि विषय दारुण । तंवचि ऐकिजे अध:पतन । तंवचि बाधा जन्ममरण । जंव रघुनंदन न देखिजे ॥६६॥ दृष्टीं देखतां रघूत्तम । सर्वांगीं वोळंगती[1] सकळ काम[2] । मागणें निमालें नि:सीम । पूर्णकाम मनोरथ ॥६७॥ असो दर्शनाची कथा । श्रीरामनाम आठवितां । पूर्णकाम मनोरथां । श्रीरघुनाथा तुझेनि नामें ॥६८॥ भक्तकामकल्पद्रुम । तो भेटतां रघूत्तम । आन इच्छी मनोधर्म । ऐसा अधम कोण आहे ॥६९॥ सावध ऐक कृपानिधी । होतां तुझी आगमनविधी । आश्रमीं वोळंगती सकळ सिद्धी । मागणें बुद्धि विसरली ॥७०॥

निर्विषयचित्त होऊन सतत रामस्मरण घडावे अशी भरद्वाजांची मागणी. तसे रामांनी वरदान दिले : प्रसन्न होऊनि निश्चितीं । माग म्हणता रघुपती । हेंचि मागणें पुढतपुढती । जें विषय चित्तीं स्फुरों नेदीं ॥७१॥ निर्विषय निरभिमान । निर्विकल्प तुझें भजन । सर्वां भूतीं समसमान । द्यावें अनवच्छिन्न[3] सर्वकाळ ॥७२॥ कृपाळुवा रघुनाथा । आणिक न मागें जी सर्वथा । म्हणोनि चरणीं ठेविला माथा । अति अवस्था मुनिवरा ॥७३॥ तें देखोनि रघुनाथ । उचलोनि हृदयीं

---

शब्दार्थ - १. प्राप्त होतात, २. वासना, इच्छा, ३. सतत.

आलिंगित । तेणें निर्विषय झालें चित्त । सुख अद्‌भुत उथळलें ॥७४॥ आधींच तपोधन ऋषी । श्रीरामीं प्रेमा अहिर्निशीं । वरी देतां आलिंगनासी । निर्विषयसुखासी पावला ॥७५॥ सुख पावतां मुनिवर । अवघे झाले आल्हादपर । बाप कृपाळु रघुवीर । नामें वानर गर्जती ॥७६॥ देवोनियां ऋषीस वरदान । अस्तु म्हणे रघुनंदन । तेणें ऋषि सुखसंपन्न । केलें नमन साष्टांगीं ॥७७॥

तेथून स्वतः अयोध्येस जाण्यापूर्वी रामांनी हनुमंतास पुढे जाऊन कळविण्यास सांगितले : करावया अयोध्यागमन । श्रीराम करी विवंचन । चौदा वर्षें लोटलीं पूर्ण । झालें उल्लंघन मर्यादे ॥७८॥ माझेनि वियोगें भरता । होत असेल अति चिंता । मर्यादा लोटली तत्वतां । सांडील सर्वथा देहासी ॥७९॥ यालागोनि पैं पहिलें । वृत्त पाहिजे पाठविलें । हनुमंतासी पाचारिलें । आज्ञापिलें अति शीघ्र ॥८०॥

मतिमंतं हनुमंतमिदं वचनमब्रवीत् । अयोध्यामद्य एव त्वं गच्छ तूर्णं वनेचर ॥४॥
शृंगवेरपुरं प्राप्य गुहं गहनगोचरम् । वृत्तं निषादपतये वक्तव्यं वचनान्मम ॥५॥

जाताना मार्गात शृंगवेरपुरास गुहकास वृत्त सांगण्यास सुचविले : जो बुद्धीचा सागरू । भावार्थाचा महामेरू । आज्ञेचा तरी किंकरू । महावीरू हनुमंत ॥८१॥ तयासी बोलावोनि रघुपती । सांगता झाला अति प्रीतीं । तुवां जावोनि अयोध्येप्रती । आगमनस्थिती सांगावी ॥८२॥ वनवासींचा समाचार । रावणवधाचें चरित्र । बंदिमुक्त सुरवर । वृत्त समग्र सांगावें ॥८३॥ गुहक आमुचा निजमित्र । मार्गीं त्याचें आहे नगर । नामें शृंगवेरपुर । त्यासी सत्वर भेटावें ॥८४॥ सांगतां आमुचें आगमन । होईल सुखें संपन्न । पावोनियां समाधान । तुझें पूजन करील ॥८५॥ तेथोनि पुढारें गमन । अति वेगें करोनि जाण । घ्यावें भरताचें दर्शन । वृत्त संपूर्ण सांगावें ॥८६॥ भरत आमुचा अनुरक्त । सर्वथा संदेह नाहीं येथ । तरी राजनीतिलौकिकार्थ । पहावें व्रत भरताचें ॥८७॥

ज्ञेयाः सर्वे च वृत्तांता भरतस्येंगितानि च । सत्वेन मुखवर्णेन दृष्टिव्याभाषितेन च ॥६॥

भरताचे चिन्ह पाहून त्याला माझ्या आगमनाची वार्ता सांगावी व सत्वर निघून यावे असे राम मारुतीला सांगतात : राज्यलोभाची जाती पाहीं । धर्माधर्म नाठवे कांहीं । ज्येष्ठाचा तेथें पाड कायी । अंध लवलाही बुद्धि होय ॥८८॥ राज्यभोग देखतां पुढें । मन होवोनि ठाके वेडें । साखरेवरोनि माशी नुडे । तेंवी जडे विषयार्थी ॥८९॥ भरताचें पित्रार्जित[१] । राज्य आहे पितृदत्त[२] । जरी झाला लोलुप्त[३] । तरी निश्चित देऊं त्यासी ॥९०॥ धर्ममर्यादा आहे ऐसी । जेथें जेथें प्रीत जयासी । तें तें अर्पावें तयासी । हेंचि साधूंचें निजव्रत ॥९१॥ राज्यलोभ तत्वतां । आम्हासीं नाहीं सर्वथा । चिन्ह पाहोनियां भरता । राज्य निश्चित देवों त्यासी ॥९२॥ धर्ममर्यादा ऐसी जाण । शीघ्र पाहोनि याचें चिन्ह । काय तें चिन्हाचें लक्षण । ऐक सांगेन संकेत[४] ॥९३॥ दृष्टीं देखतांचि प्रियासी । हर्ष दाटे सर्वांगासीं । रोमांच उभवोनि उल्लासीं । गुढी चौपासीं उभविती ॥९४॥ शीघ्र जावोनि आपण । काय तें ओळखावें चिन्ह । आमुचेंही आगमन । करीं निवेदन भरतासी ॥९५॥ अंतरींचिया प्रेमावस्था । कंठीं बाष्प दाटतां । देह नावरे सर्वथा । पडे तत्वतां मूर्च्छित ॥९६॥ अंतरीं प्रेमा अनिवार जाण । तरी हें बाह्य प्रकटे चिन्ह । अंतरीं प्रीति नसतां पूर्ण । बाह्य चिन्ह प्रकटेना ॥९७॥ ऐसी पाहोनि विवंचना । शीघ्र यावें वायुनंदना । तदनुसार अयोध्ये जाणा । करूं गमना अति प्रीतीं ॥९८॥

---

शब्दार्थ - १. पित्याने मिळविलेले, २. पित्याने दिलेले, ३. लोभी, ४. थोडक्यात.

इति प्रीतिसमादिष्टो हनूमान्मारुतात्मजः । अथोत्पतात वेगेन बलवान्कपिकुंजरः ॥७॥

रामाज्ञेप्रमाणे हनुमंताने उड्डाण केले : ऐकोनियां श्रीरामवचन । अनायासें प्रेमचिन्ह । श्रीराममुखें करून । हनुमंतें आपण ऐकिलें ॥९९॥ म्हणोन घातलें लोटांगण । करोनि प्रदक्षिणा नमन । भरतदर्शनीं प्रेम गहन । केलें उड्डाण अति वेगें ॥१००॥ गरुडवेग पवनवेग । लाजवीत मनोवेग । हनुमान चालिला सवेग । अतिबळवेग मारुती ॥१॥

शृङ्गवेरपुरं प्राप्य गुहमासाद्य वीर्यवान् । वाचा तं शुभया हर्षाद्धनूमानिदमब्रवीत् ॥८॥

हनुमान शृंगवेरपुराला आला : नामबळें अनिवार । उड्डाण केलें वेगवत्तर । गगन आक्रमिलें समग्र । श्रृंगवेरपुर पावला ॥२॥ गुहकद्वारीं कपिकुंजर । रामनामें भुभुःकार । हनुमंते केला वेगवत्तर । तेणें समग्र गजबजिले ॥३॥ अति दीर्घ रामनामध्वनी । कोणा भाग्यपुरुषाची वाणी । गर्जिन्नली दीर्घस्वरेंकरोनी । नादें अवनी दुमदुमिली ॥४॥ ज्याचे मुखीं नामोच्चारण । तो जाण श्रीरामासमान । येविषयीं श्रुतिपुराण । बाहु उभवोन गर्जती ॥५॥

हृदि रूपं मुखे नाम नैवेद्यमुदरे हरेः । पादोदकं च निर्माल्यं मस्तके यस्य सोऽच्युतः ॥१॥

रामभक्तांचे लक्षण : पार्थिवशरीरें[1] जाण । जे झाले[1] श्रीरामासमान । ऐक त्या भक्तांचें लक्षण । सावधान सुचिन्हीं ॥६॥ मनीं सतत भरली मूर्ती । चित्ते चिंतन अहोरात्रीं । बुद्धीचा निश्चय रघुपती । संसारस्फूर्ती सांडोनियां ॥७॥ देहाचे ठायीं अहंकार । झाला होता दृढोत्तर । त्यासीं गुरुवचन निजसार । पावतां सत्वर परतला ॥८॥ देहाचे ठायीं त्रिशुद्धीं । दृढ होती अहंबुद्धी । तीतें जाळोनि सोहंसिद्धी[2] । निजानंदीं प्रकटली ॥९॥ नित्य निर्माल्य मिरवे शिरीं । चरणतीर्थ अभ्यंतरीं । हरिप्रसाद त्याच्या उदरीं । तो मूर्तिधारी श्रीराम ॥११०॥ त्यासीं दृश्यमाजीं पूर्ण । सहजीं भासे रघुनंदन । ज्याचें अंतर जेथें निमग्न । तेंचि भान तयासीं दिसे ॥११॥ अतिशयें उल्लासेंसीं । नाम गर्जत आवेशेसीं । रामरूप तो निश्चयेंसीं । चला भेटीसीं जाऊं तया ॥१२॥ ऐकोनि रामनामाची ध्वनी । अद्यापि प वर्चो भेटीलागूनी । अधम ऐसें आम्हांलागूनी । आन कोणी असतिना ॥१३॥

रामभक्त मारुतीच्या दर्शनासाठी गुहक आला. त्याला रामांची माहिती गुहकाने विचारली : ऐसा करोनि विचार । श्रीरामप्रेमें वेगवत्तर । बाहेरी आले जी समग्र । तंव कपींद्र देखिला ॥१४॥ वानर होवोनि मनुष्याची वाणी । श्रीरामनाम त्याच्या वदनीं । अति प्रचंड दिसे नयनीं । श्रीरामगुणीं भरलासे ॥१५॥ अति प्रचंड विख्यात । श्रीरामप्रेमें ओतिला दिसत । तेणे गुहक हर्षभरित । प्रीतीं घालित लोटांगण ॥१६॥ प्रेमयुक्त अंतःकरण । ऐकोनियां नामस्मरण । करोनि साष्टांगीं नमन । पुसे चिन्ह कपीसी ॥१७॥ स्वामी तुम्ही कोठील कोण । मुखीं नामाचें उच्चारण । वानरी तनु काय कारण । येणें कोठून झालें स्वामी ॥१८॥

मारुतीने रामकथा थोडक्यात गुहकाला सांगून रामांच्या आगमनाची शुभवार्ता त्याला सांगितली : ऐकोनि प्रीतिमंजुळ वचन । श्रीरामीं प्रेमा गहन । तेणें हनुमान सुखैकघन[3] । लोटांगणें विनवित ॥१९॥ संपवोनि वनवासव्रत । करोनि राक्षसांचा निःपात । जनस्थान करोनि मुक्त । द्विजदानार्थ दिधलें रामें ॥१२०॥ वधूनि रावण कुंभकर्ण । विजयी झाला रघुनंदन । सुरवरांचें बंदिमोचन । न लागतां क्षण पैं केलें ॥२१॥ सुख देवोनि त्रिभुवना । सहित जानकीलक्ष्मणा । करोनि विमानीं रोहणा[4] । पैल जाणा येताती ॥२२॥ शरणागत दोघे जण । सुग्रीव आणि

---

शब्दार्थ - १.ज्यांची स्थूल शरीरे रामाप्रमाणेच बनली, २. मी शिवच आहे असा साक्षात्कार, ३. अती संतुष्ट, ४. चढणे.

विभीषण । अपरिमित वानरसैन्य । नामें त्रिभुवन गर्जत ॥२३॥ राक्षसांसी देवोनि मुक्ती । रामें उद्धरिली त्रिजगती । नामें महापातकियां गती । अगाध कीर्ति रामाची ॥२४॥ वानर वनचर पालेखाईर । केवळ श्रीरामाचे किंकर । माझे नाम हनुमान वीर । गुढी सत्वर घेवोनि आलों ॥२५॥ तुम्ही श्रीरामाचे निजगण । म्हणोनि श्रीरामें आपण। कळवावया निजगमन । गुढी देवोन पाठविलें ॥२६॥ आतां स्वस्ति[1] असो तुम्हांसीं । येतां भेटी श्रीरामासीं । मज जाणें अयोध्येसी । गुढी भरतासी सांगावया ॥२७॥ ऐकोनि हनुमंताचें वचन । गुहकें घातलें लोटांगण । वृत्त न सांगतां संपूर्ण । केंवी प्रयाण करा स्वामी ॥२८॥

एवमुक्तस्तु स गुहः संपरिष्वज्य तं कपिम् । हर्षेण महताविष्टस्तं हरिं पर्यपृच्छत ॥१०॥

क्व रामः क्व च वैदेही बुद्धिमांश्च क्व लक्ष्मणः । ह्लादितोऽस्मि त्वया सार्धं जलौघेनेव मेदिनी ॥११॥

**राम-लक्ष्मण-सीता यांच्याबद्दल गुहकाची पृच्छा :** घालोनियां लोटांगण । विधियुक्त करोनियां पूजन । करिता झाला विनवण । रामलक्ष्मण कोठें स्वामी ॥२९॥ काय सांगों त्यांची महती । निराहारी रघुपती । स्वयें निघाला वनाप्रती । सांडोनि निश्चितीं पादत्राण ॥१३०॥ कोठें आहे रघुपती । लवकरी सांग मजप्रती । सखा सौमित्र तदनुवृत्ती[2] । अनुपम ख्याती तयाची ॥३१॥ श्रीरामसेवेच्या आदरा । वीरें त्यजिली निद्रातंद्रा। तुच्छ करोनियां शरीरा । नि:शेष आहारा त्यजियेलें ॥३१॥ कोठें आहे ती जानकी माता । श्रीरामसेवेलागीं तत्वतां । बाळपणीं तापसता । अति निष्ठुरता धरियेली ॥३३॥ विमान देखिलें अंबरीं । आम्हांसी न दिसे अद्यापिवरी । सांग काय झालें परी । दीर्घस्वरीं आक्रंदे ॥३४॥

**मारुतीने गुहकाचे सांत्वन करून याच मार्गाने श्रीराम येतील असे त्याला सांगितले :** देखोनि त्याचा प्रेमभावो । हनुमंत उचंबळला पहाहो । गुहका शांत होवोनि महाबाहो । रामागमन सांगत ॥३५॥ मार्गीं येतां विमान । भरद्वाज अनन्यशरण । होवोनियां रघुनंदन । अति प्रीतींकरून प्रार्थिला ॥३६॥ तेथें क्रमोनियां आजिची राती । सर्वथा आतां विमानस्थितीं । सहित सौमित्र सीता सती । येईल रघुपति येणें मार्गें ॥३७॥ सौमित्रें अद्यापि जाण । स्पर्शिलें नाहीं अन्न । अस्थिमात्र जानकी जाण । स्वयें आपण उरलीसे ॥३८॥ श्रीरामाची गोष्टी पाहें । सर्वथा मज सांगता नये । ऐशा रीतीं आली पाहें । त्रैलोक्यीं विजय करोनियां ॥३९॥ तुमच्या भाग्याची सीमा । सर्वथा करितां नये आम्हां । नित्य स्मरण रघूत्तमा । तुमचा प्रेमा अनुवादे ॥१४०॥ श्रीरामाचें करिती स्मरण । ते आम्हांसीं पूज्य जाण । म्हणोनि घातलें लोटांगण । स्वयें उड्डाण करिता झाला ॥४१॥

स गतः शीघ्रमध्वानं महात्मा कपिकुं : । आससाद द्रुमान्फुल्लान् नंदिग्राम समंततः ॥१२॥

**गुहकाचा निरोप घेऊन मारुती नंदिग्रामाला पोचला :** हनुमंताचें उड्डाण । गुहकें स्वयें देखोनि जाण । करोनि साष्टांगें नमन । आनंदमग्न पैं झाला ॥४२॥ श्रीरामागमसुख जाण । त्यापुढें तुच्छ ब्रह्मसदन । येणें हरिखें अवघे जण । निषादगण नाचती ॥४३॥ येरीकडे[4] हनुमंत । पवना मनातेंही लाजवित । वेगें चालिला त्वरित । अक्रमीत गगनातें ॥४४॥ अति बळियाढा कपिकुंजर । मार्ग क्रमोनि सत्वर । पातला नंदिग्राम नगर । महावीर भरत जेथें ॥४५॥

**नंदिग्रामातील राममय झालेले वातावरण :** श्रीरामागमनवसंत । मूर्त पातला हनुमंत । तेणें वनश्री शोभत । अति अद्‌भुत पुष्पीं फळीं ॥४६॥ अफळें आलीं फळासीं । निरंकुरें अंकुरासीं ।

---

शब्दार्थ - १. कल्याण, २. त्याच स्थितीचा, ३. भिल्लांचा समूह, ४. दुसरीकडे.

निरसे आलीं रसासीं । निर्जीव जीवेसीं उठलीं ॥४७॥ आला जाणोनि रघुनाथ । अष्टमहासिद्धि धांवत । सत्वर पातलिया तेथ । हर्षे नाचत येवोनी पुढें ॥४८॥ तेणें मंडित नगर । सकळ लोक भजनपर । श्रीरामध्यानीं अति तप्तर । इंद्रियाचार तद्रूप ॥४९॥ एक करिती हरिकीर्तन । अर्थमय होवोनी पूर्ण । गातां श्रीरामाचें गुण । प्रेमा जाण नावरे ॥१५०॥ प्रेमें युक्त अंत:करण। पदीं गातां रघुनंदन । अंतरीं ठसावे चिन्ह । होती जाण तद्रूप ॥५१॥ अलोट कीर्तनाचें सुख । अवघे होती तदात्मक । एक होती रघुकुळटिळक । एक दशमुख पैं होती ॥५२॥ छेदोनियां श्रीरामाच्या बाणीं । शिरे अर्पिती श्रीरामचरणीं । तंव तंव उल्लास अंत:करणीं । प्रेमेंकरोनि डुल्लत ॥५३॥ ऐका श्रोते पैं सर्वज्ञ । करिती श्रीरामनामश्रवण । अर्थामाजी होवोनि निमग्न । करिती गर्जन रामनामें ॥५४॥ पदव्युत्पत्ती कीर्तन । कळा[1] विन्यास[2] ठाणमान[3] । देखतां ठसावे ज्ञान । तटस्थ पूर्ण तेणें होती ॥५५॥ ऐसे श्रीरामाचे भक्त। अवघें नगर समवेत । धन्य आचार्य भरत । श्रीरघुनाथनिजभजनें ॥५६॥ तें देखोनि हनुमान जाण । झाला अत्यंत सुखसंपन्न । एका जनार्दना शरण । अमृतपान रामकथा ॥१५७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमंतनंदिग्रामाभिगमनं नाम अष्टसप्ततितमोऽध्याय: ॥७८॥ ओंव्या ॥१५७॥ श्लोक ॥१२॥ एवं ॥१६९॥

## अध्याय एकूणऐंशीवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नम: ॥

### हनुमंत-भरत भेट

क्रोशमात्रमयोध्यायाश्चीरकृष्णाजिनाम्बरम् ददर्श भरतं दीनमृषिभि: सह वासिनम् ॥१॥

जटिलं मलदिग्धांगं भ्रातृव्यसनकर्पितम् ॥२॥

हनुमंताला भरत कसा दिसला? : अयोध्येहूनि क्रोशमात्र[4]। नंदिग्राम भरतनगर । तेथें येवोनि कपिकुंजर । पातला घर भरताचें ॥१॥ तंव वसिष्ठादि ऋषीश्वर । भरतासमीप थोर थोर । व्रतस्थ झाले समग्र । वल्कलांबर कृष्णाजिनीं ॥२॥ तापसवेषी वनचर । कंदमूळफळाहार । व्रतें धरियेलीं दुर्धर । कृशोदर पें भरत ॥३॥ अस्थि चर्म झालें एक । मांस आटलें सकळिक । रुधिर शोषिलें नि:शेख । पंजर देख उरलासे ॥४॥ श्रीरामाचेनि स्मरणें जाण । भरतदेह वांचला पूर्ण । तेणें भासे देदीप्यमान । जीवन आन असेना ॥५॥ श्रीराम स्वयें वना गेला । विषयभोग सहज चुकला । विषयीं असोनि त्याग केला । धैर्याथिला[5] महामेरू ॥६॥ राज्यभोग पैं समस्त । असतां सर्वथा नातळे चित्त । भोगीं असोनि भोगातीत । अति विरक्त देहभावा ॥७॥ सकळ भोगा देवोनि पाणी । देहा तुच्छत्वें मानोनी । अहर्निशीं रामचिंतनीं । ख्याति त्रिभुवनीं भरताची ॥८॥ सर्वथा ज्यासीं न मिळे भोग । त्यासीं सहजचि झाला त्याग । भोगीं असोनियां विराग । अभिनव भाग्य भरताचें ॥९॥ जेवीं चंदनाच्या संगतीं । सकळ वनींच्या वनस्पती । अवघ्याचि चंदन होती । बहुत शोभती चौफेर ॥१०॥ तैसें भरतें केलें पूर्ण । सकळां श्रीराम भजन। सांडोनियां मानाभिमान । श्रीराम गुण वर्णिती ॥११॥ एक झाले ते वीतराग[6] । एकीं नि:शेष केला त्याग । एक ध्यानस्थ अभंग । कीर्तन चांग पैं एकां ॥१२॥

शब्दार्थ - १. विद्या, २. हावभाव, ३. ठेवण, ४. कोसभर, ५. धैर्यसंपन्न. ६. विरक्त .

नगरींचे सकळ लोक । श्रीरामालागीं त्यक्तोदक[1] । भरतमनालागीं देख । आले सकळिक समकाळें ॥१३॥

मुदत संपली तरी राम आले नाहीत म्हणून भरताला चिंता : तंव भरत चिंताक्रांत । श्रीरामवियोगें संतप्त । अति दुःखें विलाप करित । श्रीरघुनाथ कां न ये ॥१४॥ पादुका पूजोनि अति निगुतीं । सकळ ऋषिवरांप्रती । भरत पुसतसे प्रीतीं । श्रीरघुपति कां न ये ॥१५॥ चवदा वर्षे लोटलीं पुरीं । दोन दिवस अधिक वरी । श्रीराम न येचि निर्धारीं । केली खरी उदासता ॥१६॥ श्रीराम पहिलेंचि विरक्त । राज्यभोगा उदासभूत । वरी वनवास झाला प्राप्त । सुख अद्भुत तेणें त्यासीं ॥१७॥ आत्माराम पैं निश्चित । सुचिंतनेनें नित्यतृप्त । कायसा राज्य राज्यार्थ । विषय तेथ अति मिथ्या ॥१८॥ मिथ्या पदार्थां रघुपती । नातळे सर्वथा निश्चितीं । आम्हासीं लागली आहे भ्रांती । वांछूं चित्तीं रामभेटी ॥१९॥

भरत स्वतःलाच दोष देतो : काय आम्हीं केली भक्ती । कोण आचरलों तपःस्थिती । अथवा नव्हों अंतरवृत्ती[2] । सहोदर निश्चितीं रामाचे ॥२०॥ तिळ एक भासे भेदभान । तेथ सर्वथा न मनी मन । आम्ही तरी केवळ सापत्न । केंवी रघुनंदन भेटेल ॥२१॥ पूर्वी विषयलोभें ठकलों । मायामातुळें नागवलों । श्रीरामासीं अंतरलों । भोगबुद्धी करोनी ॥२२॥ तेथोनि येतां पैं प्रयासीं । सद्गुरुचि मातें उपहासी । अंगाकारीं तूं राज्यासीं । अभिषेकासी करूं दे ॥२३॥ मजसन्मुख सकळ जन । बोलती अभिषाप दारुण । मारू जातो रघुनंदन । म्हणोनि जग निंदिती ॥२४॥ भेटों गेलों वनवासीं । तेथेंही झालों अपेशी । सौमित्र मारूं धांवे वेगेंसीं । राज्याभिलाषी म्हणवोनी ॥२५॥ श्रीराम स्वयें आपण । वचन बोलिला अति कठिण। तुज करूं अभिषिंचन । म्हणोनि आपण सरसावला ॥२६॥ तेचि काळे देहपात । माझा व्हावा त्वरित । कां वांचला जीवें जीत । पाषाणवत् भूमिभार ॥२७॥ पुढें अर्थही तैसाचि झाला । विषयाभिलाषें वहिला । राज्य घेवोनि परतला । दृढत्वें कळला लोभ रामा ॥२८॥ हनुमंत ओषधींसमवेत । गगनीं जातां मार्गस्थ । त्यांसींही केलें उद्धत । बाण अवचित सोडिला ॥२९॥ श्रीरामभक्तावरी संधान । दृढ न विचारितां केलें जाण । महापापी आन कोण । मजहूनि पैं आहे ॥३०॥ अगाध हनुम्याचा बडिवार[3] । विषाद न मानीच अणुमात्र । समाधान वेगवत्तर । मज सत्वर दीधलें ॥३१॥ ऐसें जाणतांही तत्वतां । कोण माझी विषयासक्तता । सर्वे न वचेंचि हनुमंता । लोभें सर्वथा नाडिलों ॥३२॥ नाहीं वैराग्य कडाडी । निजांगें घालोनियां उडी । भेटी न घेंचि तांतडी । धरिली गोडी विषयांची ॥३३॥ महापातकाचें फळ दारुण । निश्चयेंसीं हेंचि जाण । विषयगोडी पुनःपुन । सर्वथा मन सांडीना ॥३४॥ महापातकी विषयिपण । म्हणोनियां रघुनंदन । निश्चयें झाला उदासीन । सर्वथा वदन न पाहे ॥३५॥ कशाशी आहें जीवें जीत । इये पृथ्वीसीं भारभूत । वृथा जीवोनि काय येथ । अति निंदित लौकिकीं ॥३६॥ उदास होवोनि श्रीराम पाहे । ज्याचें हृदय सांडूनि जाये । जळो त्याचें जीवित्व काये । भार न साहे धरित्री ॥३७॥ आम्ही तरी अत्यंत आप्त । बंधु रामाचे म्हणवीत । त्यासीं न पाहे रघुनाथ । गेला निश्चित सांडूनी ॥३८॥

भरतासहित इतरांचाही रामवियोगामुळे विलाप, भरताला मूर्च्छा : म्हणोनियां शोकाकुलित । विलाप करी दुःखाक्रांत । नेत्रीं अश्रुधारा स्रवत । पडिला मूर्च्छित धरेवरी ॥३९॥ शोकें

शब्दार्थ – १. पाणी वर्ज केलेले, २. आत्मचिंतनात गढून गेलेले, ३. मोठेपणा.

जाळिलीं अंतर । प्राण जावों पाहे सत्वर । तैसाचि शत्रुघ्न महावीर । दुःखें तत्पर रामविरहें ॥४०॥ ऋषीश्वरां तेचि अवस्था । श्रीरामवियोगें भरतें चित्ता । नेत्रीं जलबिंदु स्रवतां । रोमांचितता शरीरीं ॥४१॥ कंठीं बाष्पें पैं दाटती । गात्रें चळचळां कांपती । अनावर प्रेमस्थिती । ऋषी लोळती गडबडां ॥४२॥ नागरिक लोक समस्त । श्रीरामवियोगें संतप्त । देहभाव न सांभाळित । अवघे मूर्च्छित पडियेले ॥४३॥ देखोनि भरताची अवस्था । प्रेम न साहेचि हनुमंता । मूर्च्छित पडिला तत्वतां । होय आवरिता विवेकें ॥४४॥ सत्वावस्था आवरोनि तेथ । अगोचर हनुमंत । येवोनि पहातसे वृत्त । तंव अद्भुत आणिक झालें ॥४५॥

**दशरथाच्या स्त्रियांना भरताच्या ठिकाणी रामांचा भास :** सकळ दशरथाच्या कामिनी[1] । सर्वे कैकेयी सुमित्रा दोनी । कौसल्या ज्येष्ठपत्नी । त्वरेंकरोनी पातल्या ॥४६॥ तंव येथें वेगवत्तर । माता देखती विचित्र । भरत पाहतां रघुवीर । दिसे गोचर सकळांसी ॥४७॥ तेणें झाल्या हाहाभूत । काय झाला तो भरत । कोण्या योगें रघुनाथ । येथें मूर्च्छित पडियेला ॥४८॥ काय झाला तो लक्ष्मण । कोठें गेली जनकनंदिन । रामें तयांतें सांडून । केलें आगमन एकलें ॥४९॥ म्हणोनि अवघीं दुःखाक्रांत । करमकळीं ललाट पिटित । सकळा हंबरडा हाणित । देहपात होऊं पाहे ॥५०॥ रामरूपें भरतासी । माता धरोनि पोटासीं । रुदन करी आक्रोशीं । झणें[2] मोकलिसी[2] श्रीरामा ॥५१॥ रायासवें सहगमन । करितां तुझे भेटीलागून । अति युक्ति करोनि जाण । सद्गुरूनें आपण राहविलें ॥५२॥ रामाचे भेटीपुढें । सहगमन तें बापुडें । म्हणोनियां वाडेंकोडें । निजनिवाडें राहविलें ॥५३॥ यालागूनि मुखचुंबन । माता करितसे जाण । कां बा न देसी प्रतिवचन । कायसें मौन धरियेलें ॥५४॥ धन्य भाग्य तें भरताचे । ध्यान करितां श्रीरामाचें । सबाह्य तद्रूप झालें साचें । ऐसें ध्यानाचें महिमान ॥५५॥

**भरत शुद्धीवर आल्यावर तो राम नाही हे कळल्याने कौसल्या अधिकच दुःखी :** श्रीरामरूप देखोनि माता । अति आक्रोशें विलाप करितां । भरत सावध झाला चित्ता । दुःखित माता देखिली ॥५६॥ येरी पाहे सावधान । तंव राम नव्हे भरत जाण । तेणें अत्यंत उद्विग्न । रघुनंदन न देखे ॥५७॥ राम आतां येथें होता । तूतें देखिलें नाहीं भरता । ऐसे बोल बोलतां । झाली माता विव्हळ ॥५८॥ तेणें भरत अत्यंत । सर्वे झाला दुःखाक्रांत । कां पां न येचि रघुनाथ । काय ऋषिभाषित लटिकेंचि ॥५९॥ अनागत रामायणीं । वदली वाल्मीकाची वाणी । ते लटकी झाली कैसेनी । श्रीराम अझूनी नयेचि ॥६०॥ हनुमान येवोनियां येथ । स्वयें बोलिला पुरुषार्थ । शीघ्र आणीन रघुनाथ । तेंही भाषित लटिकें काय ॥६१॥ असो हनुमंताची गोष्टी । असो ऋषीची चावटी । श्रीराम स्वयें वाक्पुटीं । बोलिला गोष्टी तेही लटिकी ॥६२॥ पितृआज्ञा पैं नेमस्त । चौदा वर्षे वनवासाव्रत । संपादोनि इत्थंभूत[3] । येईं निश्चित नेमार्तीं ॥६३॥

**रामांची भेट नाही म्हणून भरताचा प्राणत्यागाचा निर्धार :** श्रीरामाचीं वचनें ऐसीं । तींही वृथा झालीं कैसीं । आतां ठेवोनि काय देहासीं । जीवघातासी करीन ॥६४॥ रामांवाचूनि धडफुडी । देहहाडाची कोरडी । कोण सोशील जन्मबेडी । घालूं कडाडीं देहपाता ॥६५॥ तें देखोनि हनुमंत । झाला अत्यंत भयभीत । कठिण भारी रघुनाथ । चिन्ह पाहवीत काय याचें ॥६६॥

---

शब्दार्थ - १. स्त्रिया, २. त्याग करू नकोस, ३. बरोबर.

याहीउपरी पाहतां चिन्ह । याचें होईल प्राणोत्क्रमण। ऐसें दिसताहे निर्वाण[1] । रामागमन नायकतां ॥६७॥

त्या बिकट प्रसंगी हनुमंताचे तेथे आगमन : म्हणोनि हनुमान लवडसवडी । आठां भावांची परवडी । उभवोनि स्वानंदाची गुढी । हाक फोडी रामनामें ॥६८॥

अनुशोचति काकुत्स्थे हनूमान्वाक्यमब्रवीत् । प्रियमाख्यामि ते वीर शोकं जहि सुदारुणम् ॥३॥
अस्मिन्मुहूर्ते रामेण भ्रात्रा त्वं संगमिष्यसि । निहत्य रावणं रामो प्रियां लभ्य च मैथलीम् ॥४॥

सीता व लक्ष्मण यांसह श्रीराम येत असल्याचे मारुतीने सर्वांना सांगितले : सत्वमूर्ती राया भरता । सांडूं नको गा जीविता । घेवोनि आलों रघुनाथा । सौमित्रसीतासमवेत ॥६९॥ उठवोनियां लक्ष्मण । क्षणें निवटिला रावण । बंदींचे सोडविले सुरगण । राज्यीं बिभीषण स्थापिला ॥७०॥ सोडवोनि जनकनंदिनी । राया दशरथा भेटोनी । विजयी झाला राम त्रिभुवनीं । येत विमानीं अति वेगें ॥७१॥ मार्गीं भरद्वाजें आपण । प्रार्थोनिया रघुनंदन । राहविलें फळ-भोजना । तेथें जाण गुंतलें ॥७२॥ तुज होत असेल चिंता । म्हणोनि कळवळा रघुनाथा । याचिलागीं तत्वतां । पुढें मज आतां पाठविलें ॥७३॥ तंव तैसेचि देखों येथ । श्रीरामवियोगें समस्त । अवघेही दिसता दुःखाक्रांत । जैसी प्रेतें जीवहीन ॥७४॥ शोक सांडोनि निश्चिती । व्हावें सावध समस्तीं । पैल आला रघुपती । भाक निगुतीं ही माझी ॥७५॥

रामांच्या आगमनाची वार्ता ऐकताच सर्वांना अपार आनंद. भरताचे मारुतीला दृढालिंगन : ऐकतांचि तो वचनार्थ । अवघे झाले सावचित्त । येवोनि नमिती हनुमंत । आनंदभरित ते सकळी ॥७६॥ प्राणोत्क्रमणसंकटीं । जेवीं होय अमृत वृष्टी । तेंवी श्रीरामागमनगोष्टी । कपिवाक्पुटीं[2] ऐकिली ॥७७॥ दुकाळिया जेंवी मिष्टान्न । कीं अवर्षणीं वर्षे घन । तेंवी हनुमंताचें वचन । आलें जीवन घेवोनी ॥७८॥ देखोनियां हनुमंतातें । मिठी घालोनियां भरतें । आलिंगोनी ठेविला तेथें । झाली समस्तें सजीव ॥७९॥ भ्रमबुद्धी हरपे रत्न । तें स्वबुद्धी पाहतां न लभे जाण । दीपागमन होतांचि पूर्ण । सांपडे क्षण न लागतां ॥८०॥ तेंवी रामागमनसुखाचा । हनुमान दीप हर्षाचा । मोहांधकारीं बुडतां साचा । झाला प्रकाशाचा सुकाळ ॥८१॥ निरसोनियां मोहांधकार । उजळलें सकळांचें अंतर । अंतरीं प्रकाशला रघुवीर । दुःख समग्र निरसिलें ॥८२॥ दुःख निरसोनि सुखदाता । श्रीरामासीं भेटी करिता । ऐसिया सद्गुरूसीं तत्वतां । उत्तीर्णता[3] केंवी घडे ॥८३॥ चिंतामणि दे चिंतितार्था । कल्पतरू कल्पिलें देता । सद्गुरू दे निर्विकल्पता । त्यासीं आता काय द्यावें ॥८४॥ कामधेनूची दुभणी । कामनारूप त्याची देणी । अचिंत्य देणें सद्गुरूवचनीं । उत्तीर्ण त्यालागूनी केवीं होय ॥८५॥ देऊं परिस धातु अर्थ । अर्थ तितुकाही अनर्थ । तेणें न घडेचि उत्तीर्णत्व । अगाध दातृत्व सद्गुरूचें ॥८६॥ देहें उतराई होऊं सद्गुरूसीं । तरी नैश्वर्य देहासीं । नैश्वर्यें पैं अनैश्वर्यासीं । उत्तीर्ण त्यासीं घडेना ॥८७॥ आतां एकचि विवंचन । तनुमनसहित धन । कीजे सद्गुरूसीं निवेदन । तरी उत्तीर्ण कांहीएक ॥८८॥ त्याहूनि वेगळा आणिक । न दिसे पदार्थ असंख्य । सर्वस्वें अर्पोनियां देख । चरणीं मस्तक ठेवणें ॥८९॥

सर्वांचें मारुतीला वंदन व आनंदोत्सव साजरा करतात : ऐसा करोनि निर्धार । चरणीं माथा पैं सत्वर । ठेवोनि नमिला कपींद्र । मौनेंकरोनि सत्वर पैं भरतें ॥९०॥ कौसल्यादि माता अशेष । सुमंतादि प्रधान देख । आनंदभरित होवोनि लोक । कपिनायक नमियेला ॥९१॥

---

शब्दार्थ - १. शेवट, २. हनुमंताचे मुखाने, ३. उतराई.

दु:ख निरसिलें सकळिक । आनंद झाला अलौकिक । नामें गर्जती एकएक । रघुनायक निजविजयी ॥९२॥ येरयेरां क्षेम देती । येरयेरां आलिंगिती । खांदीं घेवोनि मारुती । नाचताती आनंदें ॥९३॥ दीपावली नीराजनें । हनुमंतासीं अक्षय वाणें[1] । जीवभावाचीं बळिदानें । सांडितीं पवनपुत्रावरूनी ॥९४॥ त्राहाटिल्या निशाणभेरी । गगन गर्जे मंगलतुरीं । गुढिया तोरणें घरोघरीं । प्रीतीं थोर उत्साहो ॥९५॥ घरोघरीं मंगलार्चनें । प्रीतीं मांडिलीं कीर्तनें । मृदंग श्रुतिमधुर गाणें । टाळ चिपळ्यांसमवेत ॥९६॥ उपांगें वाजती अतिगहिर[2] । तुळसीमाळा परिकर[3] । सुमनवृष्टि अति सादर । होती अपार कीर्तनें ॥९७॥

रामाच्या दर्शनासाठी निघण्याची तयारी करावी असे मारुतीने सुमंत प्रधानाला सांगितले : तें देखोनि हनुमंत । अत्यंत झाला आनंदभरित । प्रधान बोलोवोनि सुमंत । स्वयें सांगत तयासी ॥९८॥ निवांत काय होसी मानसीं । जाणें श्रीरामभेटीसीं । करावया सामग्रीसीं । दळभारेंसीं संजोगा ॥९९॥ प्रेमें विकळ भरत । शत्रुघ्न तैसाचि तेथ । तुम्ही संपोदोनि समस्त । चला रघुनाथदर्शना ॥१००॥ ऐकोनियां ते वाणी । भरत उठला तत्क्षणीं । लागला हनुमंताच्या चरणीं । भली आठवण दीधली ॥१॥ नाहीं तरी आम्ही येथ । पडिलों असतों तटस्थ । कोण करिता सावचित्त । श्रीरघुनाथदर्शना ॥२॥

हनुमंतकृत भरतगुणवर्णन : ऐकोनि भरताचें वचन । हनुमान घाली लोटांगण । करीत अति प्रीतीं विनवण । सावधान परियेसीं ॥३॥ प्रेमा म्हणिजे सत्वावस्था । राम तिहीं गुणांपरता । गुणीं पहातां तत्वतां । राम सर्वथा भेटेना ॥४॥ म्हणोनियां अति सावधान । नि:शेष रज तम त्यागून । सत्वावस्था उठली जाण । तीही आपण जिरवावी ॥५॥ प्रेमावस्थामूर्च्छितवृत्ती । येथें श्रवण कोणाप्रती । कोण पावे अर्थप्राप्ती । श्रोते निश्चितीं तटस्थ ॥६॥ जेथें गुणाचें आवरण । तेथें कैंचे रामदर्शन । म्हणोनि साधकें आपण । सर्वथा गुण जिंकावे ॥७॥ नि:शेष गुणांचा निरास[4] । तैं मोक्षपुरीसीं होय वास । तुम्ही तरी तेथींचे क्षितीश[5] । आणि अनुज[6] रामाचे ॥८॥ म्हणोनि तुम्ही तत्वतां । गिळोनियां सत्वावस्था । चला भेटूं रघुनाथा । अति सत्वरता निघावें ॥९॥ पाक जरी आला निगुतीं । तरी वाफ जिरों देती । बाहेर निघाल्या शीघ्रगतीं । राहे निश्चितीं अपक्व ॥११०॥ तेंवी रजतमाचे निरास । सत्व वाढलें असमसाहस[7] । तेंही जिरतां सावकाश । राघवेश तैं भेटे ॥११॥ विषयेंद्रियगुणग्राम[8] । रहित स्वसुखआराम । तैं बोलिजे श्रीराम । सिद्धांत परम उपनिषदीं ॥१२॥ ऐसी श्रीरामसंस्था । आम्ही ऐकों परंपरता । तरी हे उफराटी वार्ता । तुजप्रति कथा आम्ही सांगों ॥१३॥ तूं आमचा माता पिता । स्वामी गुरु कुळदेवता । जैसा राम तैसा तूं भरता । अति उद्धतता म्यां केली ॥१४॥ म्हणोनि घातलें लोटांगण । क्षमा करावी आपण । आणीक एक ऐकें चिन्ह । अधिकार पूर्ण असे आम्हां ॥१५॥ बाळका बोलों शिकवी माता । तीपुढें तें वाचाळता । करितां सुखावे माता । परी सर्वथा क्षोभेना ॥१६॥ तेंवी तुमचीं बाळें आम्ही । म्हणोनि वल्गोजों निजधर्मी । न विचरितां सेवकस्वामी । निजकृपा तुम्ही संतोषा ॥१७॥

हनुमंताची विनम्रता पाहून भरताने त्याला आलिंगन दिले : ऐकोनि हनुमंताचें वचन । भरत झाला सुखायमान । हृदयीं धरिला आलिंगून । तूं जिवलग पूर्ण रामाचा ॥१८॥ आम्ही म्हणवूं सहोदर । परी राम नेणों साचार । वृथा वाहों शरीरभार । देवोनि आहार नाशित ॥१९॥

---

शब्दार्थ - १. वायूने, २. अति गंभीर, ३. सुंदर, ४. नाश, ५. राजे, ६. कनिष्ठ बंधू, ७. अमर्याद, ८. विषय, इंद्रिये यांचा समुदाय.

रामविस्मरणें आहार देख । जठराग्नि त्याचा शुद्ध पाक । सर्वथा न करी देख । करोनि पैं नरक सांडी ॥१२०॥ अग्नि क्षोभलियाचें लक्षण । अहर्निशीं विषयचिंतन । अवस्था उन्मत्त पूर्ण । नरक लक्षण या नांव ॥२१॥ शुद्ध पाकाचें लक्षण । सर्वेंद्रियें सावधान । अनिमेष रामस्मरण । होवोनि प्रसन्न अग्नि करी ॥२२॥

**हनुमंताची भरतकृत प्रशंसा :** आपुली निजतेज दीप्ती । श्रीरामभक्तांच्या हातीं । अग्नि देत संतोषस्थितीं । तेणें शोभती देदीप्यमान ॥२३॥ हें तुझ्या ठायीं प्रत्यक्ष । हनुमंता दिसे सावकाश । श्रीरामतेजें स्वप्रकाश । त्रैलोक्यास मंडन ॥२४॥ आतां असोत या व्युत्पत्ती । असदारोपण[१] म्हणजे स्तुती । तरी ते न घडे निश्चितीं । तुझी ख्याती अनिवार ॥२५॥ जितकी श्रीरामाची कीर्ती । तितकी तुझी ख्याति मारुती । म्हणोनि माथा चरणाप्रती । ठेवोनि कपिपति नमियेला ॥२६॥

प्रत्याख्यानं न मे वीर वदामि वद किं प्रियम् । गवां शतसहस्रं वा ग्रामाणां च शतं वरम् ॥५॥

**भरताने प्रसन्न होऊन मारुतीला वर देण्याची तयारी दर्शविली :** प्रेमाचेनि पडिभरें[२] । योग्यायोग्य पैं न सरे । हनुमंतासीं अत्यादरें । नृपवरें विनविलें ॥२७॥ अति प्रिय रामकथा । विजययात्रा हनुमंता । तूं सांगितली तत्वतां । काय आतां तुज देऊं ॥२८॥ प्रीतिपूर्वक परियेसीं । जे उपेक्षा असेल मानसीं । ते सांगावी मजपासीं । शंका मानसीं न धरावी ॥२९॥ देऊं गाईंची शतसहस्रें । देश नगरें अपारें । किंवा धान्याचीं कोठारें । धनभांडारें असंख्यात ॥१३०॥ इंद्रपद लोकपाळेंसीं । पाताळपन्नग अमृतेंसीं । सत्यलोक पैं मागसी । कैलासवैकुंठासी देईन ॥३१॥ काय अपेक्षित तुझ्या चित्ता । शीघ्र आज्ञापीं पवनसुता । तेणें आश्चर्य हनुमंता । भरतप्रताप देखोनी ॥३२॥

**भरताच्या दातृत्वाची प्रशंसा :** अतिशयें सुखावोनि चित्तीं । हनुमान विनवित भरताप्रती । अगाध तुझी उदारशक्ती । बंधु निश्चितीं रामाचा ॥३३॥ जैसी श्रीरामाची निजख्याती । तैसीच तुझी प्रतापशक्ती । दानीं देता त्रिजगती । अटक निश्चितीं नाहीं तुम्हां ॥३४॥ आम्ही तुमचे अनुचर। केवळ श्रीरामाचे किंकर । श्रीरामभजनें चराचर । नाहीं दुस्तर हरिभक्ता ॥३५॥

**रामभक्तांना कसलीच अपेक्षा नसते :** श्रीरामाचें ध्यान करितां । ब्रह्मादिकां दुस्तर चिंता । आमचें पद घ्यावया तत्वतां । ध्यान रघुनाथाचें करितात ॥३६॥ म्हणोनि ब्रह्मादि अमरकोडी[३] । विघ्नें उठविती कडाडीं । दावोनि नाना विषयगोडी । पाडिती मुरकुंडी मनाच्या ॥३७॥ तथापि निश्चयाचे भक्त । सर्वथा न होती ध्यानच्युत । ते विषयींचा श्लोकार्थ । सावचित्त परियेसीं ॥३८॥

त्रिभुवनविभवहेतवेप्यकुंठस्मृति रजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ।
न चलति भगवत्पदारविंदा- ल्लवनिमिषार्धमपीह वैष्णवाग्र्यः ॥६॥

**हनुमंताने वर्णिलेला ध्यानमहिमा :** सुरासुरांचिया पंक्ती । ज्यालागीं नाना साधनें करिती । तरी ज्यांसी नव्हे प्राप्ती । दुष्प्राप्य निश्चितीं त्रिलोकीं ॥३९॥ तेंवी त्रिलोकींचें राज्य सर्वही । महासिद्धींसमवेत पाहीं । हात जोडोनि भक्ताच्या ठायीं । तिष्ठत लवलाही दासत्वें ॥१४०॥ भगवच्चरणारविंदाहून । जरी क्षण एक काढी मन । तरी तितुकेंही त्यासीं देऊन । म्हणवोनि जाण तिष्ठती ॥४१॥ परी हा निष्टंक दादुला । दुस्तर धैर्याथिला[४] । चरणध्याना वहिला । क्षणही मनाला काढीना ॥४२॥ चरणध्यानाचा तो क्षण । त्रिभुवनविभव त्यावरून । सिद्धींसहित ओंवाळून । निंबलोण सांडित ॥४३॥ भक्त जिज्ञासु साधक ज्ञानी । तयांमाजी

---

**शब्दार्थ -** १. मिथ्या आरोप करणे, २. अधिकतेने, ३. देवांचे समुदाय, ४. धैर्यसंपन्न.

अग्रगणी । लवनिमिषार्धही चरणींहूनी । लोभें मन काढीना ॥४४॥ कोणते म्हणती चरण । ऐक त्यांचेहीं लक्षण । आदिकरोनि त्रिनयन । करिती ध्यान जयाचें ॥४५॥ ब्रह्मा जो कां सृष्टिकर्ता । त्रैलोक्यासीं सर्जन[1] करिता । सत्यलोकराज्यभोक्ता । वेद मूर्तिमंत तये स्थानी ॥४६॥ जेथें सत्य मूर्तिमंत । तप मूर्तिमंत तेथ । महासिद्धि होवोनी मूर्त । नित्य नांदत जये स्थानीं ॥४७॥ ऐसियां भोगांची विश्रांतीं । ब्रह्मयासीं न मनेचिं सर्वार्थी। मग बैसोनी एकांती । चरण चिंती हरीचे ॥४८॥ तरी सहसा नव्हे प्राप्ती । मग लाजोनी प्रजापती । पोटा आला लक्ष्मीप्रती । चरणप्राप्ती तरी नव्हे ॥४९॥ तैसाच जाण शूळपाणी । त्रिनयन कैलासभुवनी । उमेसारिखी कामिनी । अनुदिनीं भोगासीं ॥१५०॥ नंदी भृंगी आदि महागण । विद्यानिधि हृदयरत्न । तेणें न पवेचि समाधान । मग त्यागून निघाला ॥५१॥ सर्वस्वें त्यागोनी शूळपाणी । हातीं पायीं राख लावोनी । ध्यानस्थ बैसला श्मशानीं । चरणचिंतनीं रामाच्या ॥५२॥ हृदयीं ध्यान चरणांचें । मुखीं नाम श्रीरामाचें । मुकुटीं भूषण निष्कर्माचें । तीर्थ रामाचें परिकर ॥५३॥ तोही ठकिला हरिमाया । सांडोनी श्रीरामाच्या पायां । आलो मोहिनी पुसावया । द्रवोनी वीर्या पडिला तो ॥५४॥ तेथें इंद्र वरुण कुबेर जाण । यांची गणना करी कोण । पावावया हरिचरण । सामर्थ्य जाण तया नाहीं ॥५५॥ ऐसें दुष्प्राप्य श्रीरामचरण । ते भक्तां लाधले संपूर्ण । ते सांडूनि इच्छी आन । ऐसा अभागीं कोण त्रिजगतीं ॥५६॥ तूं सूर्यवंशी नृपती । आणि अनुज रघुपती । याचकें याचितां तुजप्रती । स्वयें त्रिजगती अर्पिसी ॥५७॥

सदैव रामचरणांची प्राप्ती व्हावी अशी मारुतीने भरताजवळ मागणी केली : मी किंकर तुझें साचार । हेंचि मागें उत्तरोत्तर । श्रीरामचरणांहूनी अन्यत्र । वांछा कोठे न वचावी ॥५८॥ म्हणोनी घातलें लोटांगण । तेझे भरत सुखायमान । श्रीरामाचें यथार्थ ज्ञान । तुजसीं जाण कळलेसें ॥५९॥ श्रीराम सांडोनी आन । जो जो कां वांछी धन मान । त्यासीं श्रीरामाचें ज्ञान । सर्वथा जाण दुर्लभ ॥१६०॥

भरताचा दानधर्म : नमन करोनी कपीसीं । आलिंगिला अति प्रीतीसीं । दान उच्चारिलें वाचेसीं । तें तें याचकांसीं देता झाला ॥६१॥ दिधलें गाईंचें सहस्त्र । धान्यकोठारें अपार । अश्व गज दानांचे भार । भरतें अपार वांटिले ॥६२॥ दिधलीं धनाचीं भांडारें । देश पुरें नगरें । भरतें वाटिलीं परिकरें । आशा दानभरें निमाली ॥६३॥ श्रीरामगमनें विशुद्ध । याचकांसी झाला परमानंद । पेललें[2]संतृप्तीचें दोंद । आनंदकंद श्रीराम ॥५४॥ भरत वांटीत प्रीतीकरीं । याचकांचें इच्छेवरी । तंव याचकांचा दुकाळ भारी । रामागमने करी संतृप्त याञ्चा ॥६५॥ ऐसें देवोनियां दान । भरत आनंदी निमग्न । तंव विनवी वायुनंदन । चला रघुनंदनदर्शना ॥६६॥

"रामदर्शनार्थ लवकर चला" हनुमंत : येथेंचि विलंब लागला पाहें । श्रीराम येईल लवलाहें । मग पुढें जावोनी काये । चला लवलाहें दर्शना ॥६७॥ ऐकोनि हनुमंताचें उत्तर । अवघे उठले वेगवत्तर । सिद्ध होवोनी समग्र । जाती रघुवीरदर्शना ॥६८॥ शरण एका जनार्दना । भरत आणि रघुनंदना । सप्रेम भेटी दोघां जणा । त्या निरूपणा राम वदवी ॥१६९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां भरतहनुमंतदर्शनं नाम एकोनाशीतितमोऽध्यायः ॥७९॥ ओंव्या ॥१६९॥ ॥ श्लोक ॥६॥ एवं ॥१७५॥

---

शब्दार्थ - १. उत्पत्ती, २. वाढले.

## अध्याय ऐंशीवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### गुहकाला श्रीरामांचे दर्शन

रामदर्शनाला जाण्यासाठी सैन्य सिद्ध करण्याची सुमंतांची सेनापतींना आज्ञा : सुमंता आज्ञापी मारुती । शीघ्र संजोगा सैन्यसंपत्ती । येरें ऐकतां अति प्रीतीं । आनंद चित्ती उथळला ॥१॥ तेणें आनंदेंकरोनि जाण । घातलें मारुतीसीं लोटांगण । सेनापतीसी आज्ञापन । केलें आपण सुमंतें ॥२॥ आपुलाले दळभार । सिद्ध करा अति सत्वर । भरत निघाला वेगवत्तर । श्रीरघुवीरदर्शना ॥३॥ तंव भरतें करोनियां दान । सुखी केलें दीनजन । आनंदमय प्रसन्नवदन । काय गर्जोन बोलत ॥४॥

भरताची नगर शृंगारण्याची शत्रुघ्नाला आज्ञा : भवशत्रुविनाशना । ऐकें सुबंधो शत्रुघ्ना । सेनापतीसी करोनि आज्ञा । सहित प्रधानां सिद्ध करवीं ॥५॥

श्रुत्वा तस्य तदा वाक्यं भरतः सत्यविक्रमः । क्षिप्रमाज्ञापयामास शत्रुघ्नं परवीरहा ॥१॥
दैवतानि च चैत्यानि वेश्मानि नगरस्य च । विचित्रैर्गंधमाल्यैश्चाभ्यर्च्यतामिति सर्वशः ॥२॥
भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नः परवीरहा । तदादिश्य सहस्राणि चोदयामास वीर्यवान् ॥३॥

मारुतिवचनें भरत । रामागमनें हर्षयुक्त । तेणें आनंद अत्यद्भुत । पोटीं अत्यंत उथळला ॥६॥ तेणें पूर्णानंदेंकरून । आज्ञापिला शत्रुघ्न । नगर शृंगारावें संपूर्ण । जेणें रघुनंदन सुखावे ॥७॥ ऐकोनि भरताचें वचन । अति आल्हादें शत्रुघ्न । सेनापतीस आज्ञापन । करोनि सैन्य सिद्ध केलें ॥८॥

शृंगारलेल्या ह्या नगरीचे रूपकात्मक वर्णन : नगर शृंगारिलें प्रीतीं । देवसदनें अति निगुतीं । मुक्तघोष[१] पैं झळकती । देखतां निश्चितीं मन निवे ॥९॥ यंत्रपाठीं आवरणें जैसीं । कीं ध्यानस्थ सिद्धांची वोळी कैसी । नक्षत्रमाळापरी तैसी । चिद्रत्नेंसीं झळकती ॥१०॥ स्वर्गभोगाची जे गोडी । तेचि झाली दृढ बेडी । ते छेदावया लवडसवडी । दृढ आवडी श्रीरामीं ॥११॥ भेटावया श्रीरघुपती । धरूं भरताची संगती । म्हणोनियां शीघ्रगतीं । नक्षत्रें प्रवेशती माळेमाजी ॥१२॥ मध्यपीठ[२] अति शुद्ध । वरी श्रीरामपादुका विशुद्ध । दर्शनमात्रें महाबोध । परमानंद उपासकां ॥१३॥ वर्णितां तेथींचा महिमा । सरस्वतीसीं लाजे ब्रह्मा । भरताचिया भजनधर्मा । वेदां सीमा न करवे ॥१४॥ सभामंडपीं पडशाळा । शृंगारिलिया सुमनशाळा । सुखी व्हावया जनकबाळा । अति सोहळा पैं केला ॥१५॥ निजगृहीं स्त्रीशाळा । शृंगारिल्या कुशळकळा । भांडारगृहें चित्रशाळा । शेजारशाळा सोज्ज्वळ ॥१६॥ वनवासींचा श्रम समस्त । देखतांचि पैं साद्यंत । सकळ निरसोनि जाय तेथ । ऐसें अद्भुत रचियेलें ॥१७॥ अश्वशाळा गजशाळा । कापडगृहें[३] शस्त्रशाळा । कंडणीपेषणीपाकशाळा[४] । जळशाळा मनोहर ॥१८॥ नगर शृंगारिलें कोडे । श्रीरामकीर्तीचे हुडे[५] । ध्वज उभारिले चहूंकडे । देखतां उडे भवभय ॥१९॥ पताकाइतिहास[६] अंबरीं । देखतां ऐकतां श्रवणांतरीं । आनंद होतसे बहुतापरी । चिदंबरीं रहिवास ॥२०॥ मुक्त अभिमानें शिणले । ते श्रीरामभेटी आले । नगरीं अनुष्ठानें मांडिलें । अधोमुख मुक्तघोषेंसीं ॥२१॥ श्रीरामदर्शन त्वरित । मुक्तीसीं मोक्ष निश्चित । येणें निश्चयें सतत । ओळंकबत दर्शना ॥२२॥ भक्तिपल्लव परिकर । श्रीरामप्रेमें सार्द्र । पालविती वेगवत्तर । श्रीरघुवीरदर्शना ॥२३॥

---

शब्दार्थ - १. मोत्यांचे घोंस, २. मध्यस्थान, ३. तंबू, ४. कांडणें, दळणे व पाक करणे यांच्या जागा, ५. बुरूज, ६. पताकांची गोष्ट

माडिया गोपुरांचिया परी । सांगतां अनुपम्य भारी । कांहीं सांगेन संक्षेपाकारीं । श्रोतीं समग्रीं क्षमा कीजे ॥२४॥ प्रथम मोक्षाची पुरी । जे दुर्लभ सुरासुरीं । आत्माराम राज्य करी । तेथींची थोरी केंवी वर्णवे ॥२५॥ मुळीं अधिष्ठान श्रीराम एक । चैतन्य गाडोरा सुरेख । त्यावरी नगर रचिलें देख । विराजे सुरेख मोक्षश्रिया ॥२६॥ शुद्धाच्या ठायीं सहजस्थिती । अहमात्मैक उठे स्फूर्ती । तैसा पाया गृहाप्रती । बांधिलीं जोतीं नेमस्त ॥२७॥ जेंवी त्रिगुणांची उभवणी । तेंवी जोतियां मेखा तिन्ही । मुक्तीच्या चैतन्यखेवणी । निश्चयेंकरोनी बैसविल्या ॥२८॥ पाचूंचे खांबांचे परिकर । प्रतिगृहीं मनोहर । जेंवी पंचभूतप्रकार । धरी भार चराचर ॥२९॥ उथाळीं पोळियांचीं शोभत । जेवीं नेमस्त धातु सात । त्या चिद्रत्नीं भिंती जडित । अति मंडित निजतेजें ॥३०॥ दहा गवाक्षें[1] निजनिर्वडीं । दावती नाना परवडी । परी ते एका प्रकाशाची ओढी । दावती गोडी एकत्वें ॥३१॥ सकळां प्रावरण वस्तूचें । तैसे शेकार गृहाचे । निवासस्थान आत्मयाचें । श्रीरामाचें निजनगर ॥३२॥ चुकोनि मुळींचें एकपण । द्वैतदुखणां भरलें पूर्ण । त्यासीं बहुसाल भासती खण । नुगवे जाण सर्वथा ॥३३॥ तळीं वरी येतां जातां । कोटी कोटी फेरे खातां । मूळ न सांपडे सर्वथा । सबाह्य पाहतां भरलेसे ॥३४॥ मोक्षपुरी अयोध्या-भुवन । अनुपम्य तेथींचें रचन । वरी शृंगारिता शत्रुघ्न । अति विचक्षण श्रीरामभ्राता ॥३५॥ भवशत्रूचा संहार करी । नित्य विराजे मोक्षपुरी । म्हणोनियां नाम निर्धारीं[2] । अति कुसरीं शत्रुघ्न ॥३६॥ तेणें नगराचें रचन । शृंगारिलें प्रीतीकरोन । अलौकिक तेथींचें महिमान । श्रीरघुनंदनसुखार्थ ॥३७॥ रथ्यांतरीं[3] वाडेंकोडें । विजु पिळोनि घातले सडे । प्रकाश पडिला निजनिवाडे । मशक त्यापुढें सत्यलोक ॥३८॥ नवल अयोध्येची परी[4] । चिंतामणीची चिंता हरी । कल्पतरूची कल्पना वारी । परिसाची निवारी जडत्वकाळिमा ॥३९॥ दशेचें दैन्य दवडी । अमृताची साल काढी । स्वानंदाची निजगोडी । नांदे उघडी अयोध्येमाजी ॥४०॥ नगरा बाह्यप्रदेशीं । आराम नित्य जीवशिवांसी । सर्वकाळीं वसंतासी । अयोध्येसीं विश्रांति ॥४१॥ प्रेमोत्फुल्ल कमळें शुद्ध । गुंजारवती कृष्ण षट्पद । ऐकोनि गंधर्व झाले स्तब्ध । सामवेद मौनावे ॥४२॥ प्रबोध पारवे घुमघुमत । तेणें शारदा चवकत । देवगुरू विस्मित तेथ । पडे ताटस्थ्य सुरसिद्धां ॥४३॥ डोलत द्राक्षांचे पैं घड । मुक्त परिपाकें अति गोड । सकळ कामाचे पुरवीत कोड । गोडिया गोड ते गोडी ॥४४॥ चूतवृक्षाचे ठायीं जाण । अच्युतफळें परिपक्व पूर्ण । रस स्रवती उलोन । गोडी गहन तयांची ॥४५॥ दाळिंबें उलर्लीं मदभारें । बीजें झळकती तेजाकारें । ज्ञानकर्मउपासनाद्वारें । रस रघुवीरें सेवावया ॥४६॥ वनामाजी अति प्रीती । श्रीरामाची गुणकीर्ती । कोकिळा पंचमें कूजती । तेणें मौनावती सामवेद ॥४७॥ शुक बोलती सिद्धांत । तेणें लाजला वेदांत । श्रीरामागमनें वसंत । पातला ऋतु मारुति ॥४८॥ ऐकतांचि श्रीरामागमन । सिद्धि पातल्या धांवोन । अयोध्येच्या बिदी[5] जाण । स्वयें आपण झाडिती ॥४९॥ ऋद्धि सिद्धि करिती मार्जन । रमा रंगमाळालेखन । स्वयें करीतसे आपण । श्रीरामागमनसंतोषें ॥५०॥ येरीकडे[6] वीर भरत । श्रीरामदर्शना उदित[7] । निघाला अति त्वरान्वित । सैन्यासमवेत गजरेंसीं ॥५१॥

अपरे मुक्तपुष्पैश्च सवर्णैः पंचवर्णकैः । राजमार्गं सुसम्बद्धं स्तुवीत शतशो नराः ॥४॥
राजदारास्तथामात्याः सैन्यश्रेण्यस्तथाश्रमाः । त्वरमाणा विनिर्याता रथैः सह महारथाः ॥७॥

---

शब्दार्थ - १. खिडक्या, २. निश्चयेंकरून, ३. रस्त्यांमधून, ४. रीत, ५. रस्ते, ६. इकडे, ७. उत्कंठित.

द्विजातिमुख्यैर्धर्मज्ञैः श्रेणीमुख्यैश्च नैगमैः । मालामोदकहस्तैश्च मन्त्रिभिर्भरता वृतः ॥६॥

शंखभेरीनिनादैश्च बन्दिभिश्चाभिवन्दितः । पादुके च पुरस्कृत्य शिरसा धर्मकोविदः ॥७॥

भरत कौसल्यादि माता, प्रधान यांसह वाजत गाजत रामांच्या दर्शनार्थ निघाला : सुमंतादि प्रधान । सेनापति अति दारुण । गजरथ सहिताभरण । निघालें सैन्य अति गजरें ॥५२॥ जेंवी मुमुक्षु अति प्रीतीं । साधनचतुष्टयसंपत्ती[1] । घेवोनि निघे आत्मप्राप्ती । भरत चक्रवर्ती तेंवी निघे ॥५३॥ कौसल्या सुमित्रा दोनी । दशरथाच्या प्रियकामिनी । श्रीरामाच्या माता उल्लासोनी । प्रीतिकरोनी निघाल्या ॥५४॥ जिचेनि वचनमात्रेंकरूनी । राज्यादिभोगां देवोनि पाणी । पादत्राणही[2] त्यागूनी । झाला वनीं वनस्थ राम ॥५५॥ जिचेनि धर्में सुरमोचन । जिचेनि निवटिला रावण । त्रैलोक्यासीं आनंद पूर्ण । विजयी रघुनंदन जिचेनि ॥५६॥ ते कैकयी श्रीराममाता । भेटों निघाली रघुनाथा । आणिक कांहीं दशरथकांता । आनंदभरितां निघाल्या ॥५७॥ सुमंतादि प्रधान । मातांसी करिती विनवण । तुमचे भेटीसी रघुनंदन । येईल आपण लोटांगणीं ॥५८॥ ऐकोनि सुमंतवचन । कौसल्या सुमित्रा आपण । काय बोलती प्रतिवचन । विवेक संपन्न प्रेमळा ॥५९॥

रामांच्या दर्शनाची मातांना उत्कंठा : पहिलें विश्वासिलें तुज । जे घेवोनि येसी रघुराज । शेखीं कळली तुझी वोज । रिता रथ मागें आणिला ॥६०॥ हातींचा सांडोनि रघुनाथ । रिता घेवोनि आलासि रथ । श्रीरामवियोगें दशरथ । झाला स्वर्गस्थ देहत्यागें ॥६१॥ राम वनवासी होतां वनीं । रायें सांडिली राजधानी । भरतें भोगां देवोनि पाणी । फळभोजनीं भूमिशायी ॥६२॥ आकांत सकळ राज्यासीं । दुःखनिमग्न अयोध्यावासी । ऐकतां त्याच्या आगमनासी । केंवी मनासी राहवेल ॥६३॥ आणिकाची असो कथा । श्रीरामातें सांडोनि येतां । हतश्री तूंचि सुमंता । दिससी तत्वतां मृतप्राय ॥६४॥ श्रीराम सकळांचे जीवन । प्रेतरूप सकळ तेणेंवीण । त्याचे ऐकतां आगमन । सर्वथा मन न राहे ॥६५॥ श्रीरामागमनगोष्टी । सकृत् ऐकतां कर्णपुटीं । भेटी न घे उठाउठीं । तो जाण सृष्टीं महापापी ॥६६॥ यालागीं गा सुमंता । सर्वभावेसीं सर्वथा । भेटी येऊं रघुनाथा । विचार अन्यथा असेना ॥६७॥ ऐकोनि मातांचें वचन । सुमंतें घातलें लोटांगण । सकळ जयजयकारें जाण । निघाले दर्शना रघुनाथाचे ॥६८॥ राम ज्यांच्या वचनाधीन । श्रीराम ज्यांचा अनन्यशरण । ज्यांचेनि बोलें होय सगुण । ते ऋषिगण निघाले ॥६९॥

ऋषिसमुदाय, समस्त नागरिक व आबालवृद्ध रामदर्शनासाठी निघाले : श्रीराम साधूंचा केला[3] । श्रीराम साधूंलागीं झाला । त्यासी भेटावया वहिला । गजरें निघाला ऋषिसमुदाय ॥७०॥ कश्यप अत्रि वामदेव ऋषी । जाबाली गौतम परियेसीं। वसिष्ठ सद्‌गुरू सूर्यवंशीं । शिष्यसमुदायेसीं निघाले ॥७१॥ इत्यादि सकळ ऋषी । जे मनें कल्पिती ब्रह्मांडासी । ते ऋषिवर वेदघोषेंसीं । श्रीरामभेटीसीं निघाले ॥७२॥ श्रीरामवियोगें संतप्त । नागरिक लोक समस्त । आला ऐकोनि रघुनाथ । उतावेळ चित्तें निघाले ॥७३॥ चाटे भाटे सोवनी सोनार । गणिक रजक[4] सुतार । तेली माळी कुंभार । अति सत्वर निघाले ॥७४॥ तांबोळी अति हरिखें उडविती पानें । फुलारी करिती सुमनसिंचनें । रंगारी सुखावले निजमनें । रावलगीं रंगणें

---

शब्दार्थ – १. वस्तुविवेक, वैराग्य, शमादि (शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा, समाधान) आणि मुमुक्षुत्व. २. खडावा इ., ३. आवडता, ४. धोबी.

उडविती ॥७५॥ श्रीरामभेटी अति हरिख । एकापुढें धांवे एक । स्त्रीपुत्रादि बाळक । एकींएक निघाले ॥७६॥ आदिकरोनि दासदासी । निघाले श्रीरामभेटीसी । वेश्या ज्या कां नगरवासी । हरिखें भेटीसी निघाल्या ॥७७॥ श्रीरामनगरीं अळुमाळ । सर्वथा नाहीं कर्मचांडाळ । नगरप्रांतीं अधिकारशीळ । तेही तत्काळ निघाले ॥७८॥ सर्वस्व त्यागोनि संन्यासी । जे विरक्त देहभावासीं । तेही श्रीरामभेटीसीं । अति त्वरेंसी निघाले ॥७९॥

रामभेटीसाठी भरत सर्वांपुढे गेल्याने इतरांचीही धावपळ : श्रीरामदर्शना भरत । पुढें गेला त्वरान्वित । म्हणोनि लोक नगरस्थ । स्वयें धांवत अति शीघ्र ॥८०॥ स्त्रीपुत्रादिसुहृदसंग । श्रीरामभेटीसी विघ्न सांग[1] । त्यांचा निःशेष होय त्याग । राम अव्यंग[1] तैं भेटे ॥८१॥ ऐसें जाणोनि निर्धारीं । रामदर्शनीं प्रीती थोरी । कोणी कोणाचा संग न धरी । आनंद भारी रामभेटी ॥८२॥ येरीकडे वीर भरत । श्रीरामभेटीसीं उदित[2] । निघाले अति त्वरान्वित । समवेत दळभारें ॥८३॥

रामदर्शनासाठी गर्जत निघालेल्या मिरवणुकीचे वर्णन : अनुभवगजांचियां हारी । गुढार[3] घातलें तयांवरी । पताका झळकती चिदंबरीं । द्वैत चकचुरी करिती पाहें ॥८४॥ निजबोध महावत[4] वरी । विवेकांकुश झळकती करीं । मर्यादा चकल्या हाणिती शिरीं । करोनि किरकिरी येती ठायां ॥८५॥ साधनचतुष्टयसंपत्ती । अति कुशळ तीक्ष्णयुक्तीं । तैसे वारू नाचती । चौताळती रामभेटी ॥८६॥ तयांवरी वळंघले वाट[5] । रणशौर्य अति उद्भट । वारुवां वाजती साट । त्राणें अंबुट कवळती ॥८७॥ रथध्वजपताकीं मंडित । चालती विमानीं जेंवी मुक्त । तेथें बैसतां सुख अद्‌भुत । लाजवित सुरवरां ॥८८॥ त्रोडण खड्ग तळपोनियां पाहीं । तुळवे नाचती लवलाहीं । मल्ल झोंबती दोहीं बाहीं । देखतां तो देही काळ कांपे ॥८९॥ तयांमागें असिवारी । यावा दावियेला स्वारीं । नाचती तींच पायांवरी । आली शारी[6] कृतांता ॥९०॥ तयांमागें चालती रथ । वारु जुंपिले हिंसत । चक्रवाटातळीं पर्वत । पीठ होत कर्माचें ॥९१॥ दोहीं बाहीं कुंजरथाट । गळदंडी गजघंट । गजी गज समसगट । घडघडाट चालती ॥९२॥ स्तोमीस्तोमीं[7] वाद्य विचित्र । ध्वनि उठला अति गंभीर । जेंवी अनुहताचा गजर । दशधा प्रकार वाजती ॥९३॥ सवें श्वेतातपत्र । कनकदंडी युग्मचामर । राजचिन्हें पैं समग्र । त्वरित चालती ॥९४॥ भाट गर्जती कैवाडें । श्रीरामाचे पैं पवाडे । तेणें वेदांत झाले वेडे । लाजिले स्वयें नेतिशब्दें ॥९५॥ सवें ऋषीश्वर असंख्य । उच्चारिती वेदघोष । माता घेउनि देख । भरत समवेत निघाला ॥९६॥ भेटावया रघुकुळटिळका । माथां ठेवोनि पादुका । आनंदमग्न होवोनि देखा । शत्रुघ्नसखा समवेत ॥९७॥ सहित माता ऋषिपंक्ती । भरत शत्रुघ्न निश्चितीं । सुमंतादि प्रधानपंक्ती । चरणीं चालती सकळिक ॥९८॥ श्रीरामशकुनालागीं तेथ । पूर्णकुंभ हेमयुक्त । दधि मधुअक्षताभरित । दूर्वासहित पूर्ण जळें ॥९९॥ मागें पालखियांची हारी । कोणी न बैसे तयांवरी । श्रीरामदर्शनीं प्रीती थोरी । हर्षे गजरीं चालती ॥१००॥ उपवासें अति संकटीं । उदर बैसलें अति खपाटीं । माथां जटांची वीरगुंठी । कृष्णाजिनगांठीं प्रावरण ॥१॥ मागें सांडोनि नगर । पुढें चालिले वेगवत्तर । मार्ग अवलोकितां समग्र । श्रीरघुवीर दिसेना ॥२॥

रामांचे विमान दिसेना म्हणून भरत उद्विग्न : दशदिशांसहित गगन । स्वबुद्धी पाहतां जाण । सर्वथा न दिसे रघुनंदन । भरत उद्विग्न स्वयें झाला ॥३॥ सांगितलें हनुमंतें । पैल तें गा विमान येतें । आणि अद्यापि न दिसे मातें । अभाग्य अद्‌भुत मी करंटा ॥४॥ तरी आतां कळलें

---

शब्दार्थ - १. पूर्ण, २. तयार, ३. हौदे, ४. माहूत, ५. वीर, ६. शहारे, भय, ७. समूहांमध्ये.

चिन्ह । कोटिधा[1] होतां पुराणश्रवण । सर्वथा नव्हे समाधान । वचनारूढ मन जंव नव्हे ॥५॥ जेणें काळें हनुमंतें । सांगितलें रामागमनातें । तेणें काळें दुश्चित चित्ते । पामर निश्चितें मी एक ॥६॥ वचनसमयीं दुश्चित्तता । गुंतलों लौकिकार्था । तेणें सुनाट[2] केली वार्ता । भेटी रघुनाथा वंचलों ॥७॥ लोकांसीं मज संबंध काय । दळभार मज काय होय । वचन वृथा गेलें स्वयें । वल्ग आहे कोरडाचि॥८॥ स्वरूपप्राप्तीची ज्यांसी आर्ती । तिहीं सांडोनि लौकिक-स्थिती । अनन्य शरण रघुपती । जावोनि एकांतीं पुसावें ॥९॥ तैसें न करींच मी तत्वतां । लोकिकी पुसिली वार्ता । तेणेंचि वंचलों सर्वथा । भेटी रघुनाथा नव्हेचि ॥११०॥ तेणें अत्यंत उद्विग्न । न भेटेचि रघुनंदन । मारुतीच्या चरणांलागून । भरत मागुतेन पुसत ॥११॥

न हि पश्यामि काकुत्स्थं राममार्यं परंतप । अर्थवमुक्ते वचने हनूमानिदमब्रवीत् ॥८॥

अथ विज्ञापयन्नेवं भरतं सत्यविक्रमम् । सद्यः फलान् कुसुमितान् पश्य वृक्षान्मधुच्युतान् ॥९॥

अत्यंत प्रीतिपुरस्कर । भरत होवोनियां नम्र । हनुमंतासी पुसे उत्तर । श्रीरघुवीर कां नये ॥१२॥ हें गा येतें विमान । म्हणोनि बोलिलासी वचन । अद्यापि त्याचें नव्हे भान । कां विलंबन लागलें ॥१३॥

श्रीराम गुहकाला भेटून लवकरच येतील असे सांगून मारुतीने भरताचे सांत्वन केले : ऐकोनियां भरतवचन । बोलता झाला वायुनंदन । यथार्थ आला रघुनंदन । पाहें चिन्ह सावकाशीं ॥१४॥ ऐक भरता सत्वमूर्ती । साचार आला रघुपती । संदेह नाहीं ये अर्थी । वोळल्या वनस्पती रसभावें ॥१५॥ निर्जीवासी जीव आले । निरंकुरासी अंकुर फुटले । अपल्लव ते पालवले । अफळ आले फळासी ॥१६॥ सजीव निर्जीव वनस्पती । अमृतरस पैं स्रवती । पुष्पीं फळीं पैं शोभती । मघमघिती चोफेर ॥१७॥ असो वनस्पतींचा भाव । तुझे अंतरींचा उत्साव । तोचि श्रीरामाचा आविर्भाव । नाहीं संदेह ये अर्थी ॥१८॥ अवस्था[4] शिणवी मना । ते निश्चयेसीं रघुनंदना । भेटवोनि समाधाना । पाठवी मना तत्काळ ॥१९॥ आतां येईल रघुपती । संदेह नाहीं ये अर्थी । मार्गी येतां शीघ्रगतीं । गुहकाप्रती सांगितलें ॥१२०॥ त्यासीं भेटोनियां जाण । आता येईल रघुनंदन । सर्वथा उदास न करीं मन । सत्यवचन हें माझें ॥२१॥ शनैः शनैः अभ्यास करितां । अबळासही ये योग्यता । तेंवी श्रीरामपंथीं चालतां । निश्चयें रघुनाथा भेटसी ॥२२॥ ऐशा वचनीं हनुमान । भरता देवोनि समाधान । स्वयें मार्गस्थ केला आपण । श्रीरघुनंदनदर्शना ॥२३॥

भरद्वाजाश्रमात रात्री मुक्काम करून भरतभेटीसाठी राम निघाले : येरीककडे रघुपती । भारद्वाजाश्रमीं क्रमोनी राती । ऋषींसहित विमानस्थितीं । शीघ्रगतीं निघाले ॥२४॥ सुखवोनियां ऋषींसी । भरताचिया भेटीसीं । राम निघाला शीघ्रतेसीं । जयजयकारेंसीं गगन गर्जे ॥२५॥ वानरांचें उड्डाण । जयजयकारें गडगर्जन । तेणें नादें त्रिभुवन । सहित गगन कोंदलें ॥२६॥ रीस वानर गोळांगूळ । नामें गर्जोनियां सकळ । आक्रमिलें नभोमंडळ । विमान बळें सांडोनी मार्गे ॥२७॥ निजनगरा राघवासी । जातां वानर उल्लासी । तें देखोनि श्रीरामासीं । निजमानसीं आनंद ॥२८॥

श्रीरामांचे विमान पाहून गुहकाकडून श्रीरामांची स्तुती : करीत नामाचा कल्लोळ । विमान चालत अंतराळ । गुहकें देखोनी तत्काळ । गर्जला प्रबळ रामनामें ॥२९॥ देखोनियां रघुकुळटिळक ।

---

शब्दार्थ - १. कोटी प्रकारांनी, २. निष्फळ, ३. आवड, ४. काळजी.

जयजयकारें गर्जोनि देख । लोटांगणीं एकएक । अत्यंत हरिख नामाचा ॥१३०॥ गुहक भाग्याचा संपूर्ण । श्रीरामासीं ज्याची आठवण । तेणें करोनियां नमन । करूं स्तवन आदरिलें ॥३१॥ जयजयाजी अव्यक्तव्यक्ता । उत्पत्तिस्थितिप्रळयातीता । स्वयें करोनि अकर्ता । होसी तत्वतां स्वामिया ॥३२॥ तूं सर्वातीत[1] सनातन[2]। सर्वसाक्षी चैतन्यघन । सकळ जीवांचें जीवन । सनातन परब्रह्म ॥३३॥ तूं सर्वदा सम । कदा नव्हसी विषम । तो तूं अभक्तां दुर्गम । सदा सुगम[3] निजभक्तां ॥३४॥ अणुमात्र करितां भजन । सर्वस्वें होसी भक्ताधीन । तुज चिंतिती भक्तजन । तुज चिंतन तयांचें ॥३५॥ नीच कुट्टिणी अनायासें । तूतें स्मरली पक्ष्याचेनि मिसें । तिसी निजपद दिधलें कैसें । तें साधनीं असोसें नव्हे प्राप्त ॥३६॥ ब्राह्मादिकां असाध्य पूर्ण । तें तियेसी दिधलें स्थान । विचारितां निंद्य कर्माचरण । माझें गहन अति भाग्य ॥३७॥ जातिहीन किरात[4] देख । कर्म तरी निजघातक । त्या मज भेटला रघुकुळटिळक । भाग्य अलोलिक पैं माझें ॥३८॥ ब्रह्मादिकां न पुससी पूर्ण । त्या तुज माझी आठवण । पाठविला वायुनंदन । समाधान गुढींसीं ॥३९॥ तेणें विजयवार्ता सांगतां। अति आल्हाद झाला चित्ता । अमृतवृष्टि होय मरतां । तेंवी रघुनाथा आम्हां झालें ॥१४०॥ राहवितां अति प्रेमयुक्त । तेथें न राहेचि हनुमंत । भरत असेल चिंताक्रांत । त्वरान्वित[5] मग गेला ॥४१॥ त्या काळापासोनि येथ । उभे असों वाट पहात । तंव विमान देखिलें जात । त्वरान्वित अयोध्येसी ॥४२॥

रामांनी विमानातून उतरून गुहकाला प्रेमालिंगन दिले : ऐसें गुहकें स्तवितां पूर्ण । जवळी येवोन विमान । श्रीरामें उचलोनि आपण । हृदयीं जाण आलिंगिला ॥४३॥ श्रीरामीं देतां आलिंगन । उडालें शून्याचें शून्यपण । चिदाभासता[6] कोंदली पूर्ण । चैतन्यघन श्रीरामें ॥४४॥

गुहकाची रामरूप अवस्था : नाठवें देहगेहस्फूर्ती । नाठवे वर्णाश्रमजाती । नाठवे कर्माकर्मगती भेटी रघुपती होतांचि ॥४५॥ आत्मया श्रीरामाचें श्रेष्ठपण । नाठवे आपुलें नीचपण । वोळला श्रीराम आनंदघन । समाधान जीवशिवां ॥४६॥ गुहकाचें प्रेम गहन । प्रेमें भेटला रघुनंदन । प्रेमें पावला समाधान । प्रेम गहन भक्ताचें ॥४७॥

निर्व्याज प्रेमाचे महिमान : प्रेमें सुटला गजेंद्रु । प्रेमें अढळ केला धुरु । उपमन्यासी क्षीरसागरु । देखोनि प्रेमादरु दीधला ॥४८॥ प्रेम तेथे भाव पूर्ण । प्रेम तेथें वैराग्य गहन । प्रेमें निरसे जन्ममरण । प्रेमेंवीण ज्ञान वांझोटें ॥४९॥ प्रेम तेथें उपजे भक्ती । प्रेम तेथें नित्य विरक्ती । प्रेम तेथें अढळ शांती । प्रेमळां मुक्ती वोळंगण्या ॥१५०॥ यालागीं भक्त साधक सज्ञान । आर्त जिज्ञासु अर्थार्थीं जाण । तिहीं प्रेम वाढवावें पूर्ण । क्षणोक्षणां अति आवडीं ॥५१॥ प्रेमाची पुढें निजकथा । भेटी भरता रघुनाथा । प्रेमाचा रसाळ वक्ता । सत्य सर्वथा जनार्दन ॥५२॥ एकाएकी प्रेम पूर्ण । प्रेमें वोळंगला जनार्दन । एका जनार्दना शरण । प्रेम अविच्छिन्न मज द्यावें ॥१५३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामगुहकदर्शनं नाम अशीतितमोऽध्याय: ॥८०॥ ओंव्या ॥१५३॥ श्लोक ॥९॥ एवं ॥१६२॥

---

शब्दार्थ - १. सर्वांहून वेगळा, २. शाश्वत, ३. कष्टानें, ४. भिल्ल, ५. मोठ्या घाईनें, ६. चैतन्यस्वरूपप्रकाश.

# अध्याय एक्याऐंशीवा

॥ श्री सद्गुरुरामचंद्राय नमः ॥

श्रीराम-भरतभेट

गुहकाचा भाव पूर्ण । भावें भेटला रघुनंदन । भाव तेथें तिष्ठे ज्ञान । विज्ञानेसीं जाण सर्वदा ॥१॥

न काष्ठे विद्यते देवो न पाषाणे न च मृण्मये । भावे हि विद्यते देवस्तस्माद्भावो हि कारणम् ॥१॥

भावार्थाचा महिमा : भावार्थी प्रेम आगळें। भावार्थे तत्व आकळे । वैकुंठींचें भाव बळें । सर्वकाळें भेटती ॥२॥ भावावीण व्यर्थ श्रवण । भावावीण व्यर्थ कीर्तन । अर्थावबोध नाहीं पूर्ण । चित्त वळघे रान विषयाचें ॥३॥ भावार्थावीण व्यर्थ ज्ञान। भावार्थावीण व्यर्थ ध्यान । अंतरीं विकल्प नांदतां पूर्ण । ज्ञान ध्यान लटिकेंचि ॥४॥ भावार्थावीण वृथा भक्ती । भावार्थावीण वृथा कीर्ती । भावार्थावीण विरक्ती । बाह्य मिरविती लटिकीचि ॥५॥ भावावीण वृथा विचार । भावावीण वृथा आचार । भावावीण कर्माचार । जाण समग्र लटिकाचि ॥६॥ तो भावार्थ मूर्तिमंत । सत्य जाण बंधु भरत । श्रीराम भेटीसी प्रेमयुक्त । ऋषीसमवेत निघाला ॥७॥

रामदर्शन होईना म्हणून भरताचा आक्रोश : हनुमंतें दिधलें समाधान । तरी भरता अवस्था पूर्ण । सर्वथा स्थिर नव्हे मन । विना रघुनंदन देखिलिया ॥८॥ परम अवस्था भरतासी । अंग टाकितसे भूमीसीं । श्रीरामें मोकलिले आम्हांसी । गति कायसी जिण्याची ॥९॥ श्रीराम आठवूनि मनीं । पदोपदीं घाली लोळणी । रुदन करी आक्रंदोनी । राम अझूनी दिसेना ॥१०॥ राम माझीं माता पिता । बंधु कुळगुरु तत्वतां । रामावीण सकळ वृथा । जिणें सर्वथा भूमिभार ॥११॥ राम माझें निजधन । राम नयनींचें अंजन । राम इंद्रियांचा चाळक पूर्ण । तयावीण तीं विकळ ॥१२॥ पडे उठे विकळ होय । गात्रकंपें चांचरी जाये । तेणें आम्हां वंचिलें[1] पाहें । करूं काये हनुमंता ॥१३॥ माझा विषयलोभ दारुण । राज्याभिलाषी मी निंद्य पूर्ण । जाणोनियां रघुनंदन । येतां जाण परतला ॥१४॥

रामदर्शन घडवावे म्हणून हनुमंताला साकडे : काय करूं गा हनुमंता । वेगें करूं देहपाता । भेटी कैंवी रघुनाथा । विचार तत्वतां मज सांग ॥१५॥ ऐसा होतसे खेदक्षीण । हनुमंतासी केलें नमन । चरणीं मिठी घातली पूर्ण । रघुनंदन भेटवीं ॥१६॥

हनुमंताने भरताला धीर दिला : येरें उठवोनि भरतासी । आलिंगिलें हृदयेसीं । करूं नको देहपातासी । तेणें श्रीरामासी नव्हे भेटी ॥१७॥ देहपातें होय भेटी । तरी कां साधक रिघती कपाटीं[2] । योगी चढती योगपीठीं । श्रीरामभेटीलागूनीं ॥१८॥ मरणें भेटतां रघुपती । तरी यमपुरी कायसा वसती । कोण पावता अधोगती[3] । मरणें मुक्ति जरी होत ॥१९॥ सांडीं दुर्बुद्धि परती । सावध होईं निश्चितीं । पैल[4] आला रघुपती । सहित कपिपती गर्जत ॥२०॥

जानकीसहित रामांचे विमान आले : रीस वानर गोळांगूळ । करीत नामाचा कल्लोळ । व्यापिलें दिसे नभोमंडळ । आलें तत्काळ विमान ॥२१॥ सर्वे बिभीषण लंकापती । सुग्रीव अंगद वानरपती । अमित वानरांच्या पंक्तीं । अंकाप्रति जनकजा ॥२२॥

---

शब्दार्थ - १. फसविले, २. गिरिकंदरांत, ३. नरकवासाला, ४. पलीकडे, ५. मांडीवर.

एतस्मिन्भ्रातरौ वीरौ वैदेह्या: सह राघवौ । सुग्रीवश्च महातेजा राक्षसश्च बिभीषण: ॥२॥
स्त्रीबालयुववृद्धानां रामोऽयमिति कीर्तनम् । हर्षेण महताविष्टो नि:स्वनो दिवमस्पृशत् ॥३॥
तं विमानगतं दृष्ट्वा सोमं नभसि वै यथा । प्रांजलिर्भरतो भूत्वा प्रहृष्टो राघवोन्मुख: ॥४॥
ददर्श ब्रह्मणा सृष्टे विमाने भरताग्रजम् ॥५॥

**नामघोषाच्या गजरांत राम अयोध्येजवळ आले :** सौमित्रसीतासमवेत । महावीरीं विराजित । विमानीं देखिला रघुनाथ । नामें गर्जत वानर ॥२३॥ भुभु:कार जयजयकार । नादें गर्जत अंबर । विमानस्थ रघुवीर । येतां सत्वर देखिला ॥२४॥ नक्षत्रेश रजनीपती[१] । गगनीं शोभे स्वप्रकाशस्थितीं । तेंवी विमानीं रघुपती । वानरपंक्तीसमवेत ॥२५॥ चंद्रासवें नक्षत्रपाळें[२]। तेवी रामासवें गोळांगुळें । गर्जत नामाच्या कल्लोळें । आले जवळी अयोध्येच्या ॥२६॥

**वानरांचा आनंदोत्सव :** अयोध्येच्या आरामवनीं । वानरीं टाकिल्या सेलाणी[४] । द्रुम आसंडिती सत्राणीं[५] । फळभक्षणीं आनंद ॥२७॥ फळें खाती गटगटां । मिटक्या देती मटमटां । गोष्टी सांगती चटचटां । सुखें वरिष्ठां विटाविती ॥२८॥ एकमेकां वांकुलिया । एकमेकां गुदगुदलिया । एकमेकां करिती रळिया[६] । श्रीरामरायाचेनि धर्मे ॥२९॥

**श्रीरामांच्या शौर्याची गाथा :** वाळी मारिला बाणेंकरी । राजचिन्हें सुग्रीवा शिरीं । शिळा तारोनियां सागरीं । वानर परपारीं उतरले ॥३०॥ पाडोनि त्रिकूटाचे कडे । खंदक बुजोनि धडफुडे । लंकादुर्गीं चहूंकडे । सैरा माकडें गर्जती ॥३१॥ धांडोळोनि घरोघर । कुंभकर्णा केला चूर । इंद्रजितासी थोर मार । करोनि सत्वर निवटिला ॥३२॥ सीतेचा सूड घ्यावयासी । अद्भुत शक्ति मारुतीसी । विध्वंसिलें रावणयागासी । आवरणांसी[७] भेदिलें ॥३३॥ जावोनियां कुंडापासीं । मूत्रपुरीषें विझविलें त्यासी । पात्रें फोडोनि वेगेंसीं । रावणासी गांजिलें ॥३४॥ तरी तो नव्हे सावधान । अंगदें साधोनि विंदान । मंदोदरीचें केशग्रहण । करोनि जाण गांजिली ॥३५॥ आक्रंदतां ते सुंदरी । रावण पोळला अंतरीं । नेत्र उघडोनि पाहे बाहेरी । तंव बोहरी यागाची ॥३६॥ तेणें खवळला दारुण । युद्धा निघाला सत्राण । लक्षोनियां रघुनंदन । निर्वाण रण करूं आला ॥३७॥ रामें एकेचि बाणेंकरीं । रावण उडविला अंबरीं । शिरें छेदोनि लक्षांतरीं । क्षणामाझारीं निवटिला ॥३८॥ रामें रावण कुंभकर्ण । इंद्रजितासी लक्ष्मण । उरले राक्षस दारुण । ते हनुमंतें निवटिले ॥३९॥ राज्यासीं स्थापोनि बिभीषण । सोडविली जानकी जाण । सुरवरांचें बंदिमोचन । रघुनंदन निजविजयी ॥४०॥ भेटोनियां दशरथासी । संस्थापना रामेश्वरासीं । आनंद होवोनि त्रैलोक्यासी । राम अयोध्येसी पातला ॥४१॥

**वानरांचा आनंदोत्सव पाहून भरत हर्षभरित झाला :** ऐसें गर्जती अद्भुत । वानर आनंदें नाचत । तें देखोनि भरत । सुखें अद्भुत उथळला ॥४२॥ चातका मेघाचें सिंचन । चकोरा चंद्रामृतपान । मृता जेंवी अमृतप्राशन । घनगर्जत मयूरा ॥४३॥ चुकल्या बाळकासी माता । पतिव्रता भेटे निजकांता । निधि सांपडे तत्वतां । जेंवी अवचिता भणंगासी ॥४४॥ मूकिया जोडे वाक्सिद्धी। अंधासी रत्नपरीक्षेची बुद्धी । श्रीराम देखतां त्रिशुद्धी । हर्षानंदी होय भरत ॥४५॥

**श्रीरामदर्शनाने भरताची भावावस्था :** सवेग उठोनि घातली कव[८]। आकाशावरी घेतली धांव । शून्य सारोनि स्वयमेव । स्वयें राघव वंदिला ॥४६॥ कोणाचें न ऐकतां श्रवण । न देखतां कोणाचें नयन । नेणतां कोणाचें महिमान । रघुनंदन नमियेला ॥४७॥ सांडोनि

शब्दार्थ - १. चंद्र, २. नक्षत्रांचे समूह, ३. बागांत, ४. उड्या, ५. बळाने, ६. चेष्टा, ७. वेष्टणांना, ८. मिठी.

मीतूंपणाची स्फूर्ती । जागी न होतां चित्तवृत्ती । मिठी घातली रघुनाथीं । अभिनव ख्याती भरताची ॥४८॥ उठतां मनाची स्फूर्ती । नायकतां बुद्धीची वृत्ती । नि:शेष त्यागोनि अहंकृती । श्रीरघुपति नमियेला ॥४९॥

भरत-राम यांची भेट जणू म्हणजे गंगा-सागराचे मीलनच ते ! : भरतरामाआलिंगनीं । रामीं हारपले दोनी । तटस्थल्या अवस्था तीनी । सुरसिद्ध मनीं विस्मित ॥५०॥ तैसाचि शत्रुघ्नही जाण । अहंकोहंसोहंविहीन । भेटतांचि रघुनंदन । येरयेरां जाण गीळिलें ॥५१॥ गंगासागरीं मिळणी जैसी । श्रीरामभरतां भेटी तैसी । स्वादासी आण साखरेसी । भेटी जैसी अभेद ॥५२॥ तैसीच भेटी सौमित्रेंसीं । भरत आणि शत्रुघ्नेसीं । भेटी झाली एकत्वासी । त्रिधा भेदासी सांडूनी ॥५३॥ सच्चिदानंदपदें देख । त्रिधा भेद वस्तु एक । तेंवी वेगळे देखतां आणिक । रघुकुळटिळक वस्तुतां ॥५४॥ द्रुति[१] मार्दव पिंवळी । त्रिधा भेदें चांपेकळी । तेंवी श्रीरामस्वरूपमेळीं । तिघे तत्काळीं अद्वय ॥५५॥ मूळीं एकत्वें एक ॐकार । तोचि झाला त्रिधा प्रकार । अकार उकार मकार । तेंवी रघुवीर बंधूंसीं ॥५६॥ पन्नास आगळ्या[२] दोनीवरी[२] । प्रणवी[३] मात्रांची उभारी । तेचि गुंफोनि श्रुतिशास्त्रीं । अर्थाकारीं विराजे ॥५७॥ तेंवी श्रीरामाचें सैन्य देख । नरवानरादि अशेख । अयोध्येचे नागरिक । एक एक तद्रूप ॥५८॥ जेंवी न लक्षितां कोणासी । ऐक्यता जैसी जीवशिवासी । तेंवी भेटी बंधुबंधूंसीं । अलक्ष्यतेसी पैं झाली ॥५९॥ पुढें सकळ सैनिकांसी । माता गुरु प्रधानांसी । राम आळवील आलिंगनेंसी । निजउल्लासीं निजस्वरूपें ॥६०॥ अति अद्‌भुत गुह्य ज्ञान । सकळीं सकळ रघुनंदन । अभेदत्वें आलिंगन । देवोनि जाण निववील ॥६१॥

श्रीराम-भरतभेटीचे वर्णन करणे हा माझा अधिकार नव्हे असे गावबा सांगतात : अति सखोल निरूपण । बोलावया मज कैंचें वदन । वक्ता एका जनार्दन । निरूपण चालविता ॥६२॥ जनार्दन वदनीं वक्ता । गुह्यज्ञान रामकथा । निजनिरूपण चालविता । वचनवदता होवोनियां ॥६३॥ जनार्दनें डोळस नयन । जनार्दन निजअंजन । देखणें दावी देखणा होऊन । रघुनंदन विश्वमूर्ति ॥६४॥ मनाचें जें निजमन । स्वयें एका जनार्दन । निरसोनि मनाचें मनपण । श्रीरामकथन स्फुरवित ॥६५॥

श्रीएकनाथांच्या कृपेने मी रामायण लिहीत आहे : मनीं कर्मी वचनी पूर्ण । चाळक एका जनार्दन । निजकथा रामायण । प्रीतीकरोनि चालवित ॥६६॥ ते ग्रंथकथनअहंता । मज द्यावया तत्वतां । संबंध नाहीं सर्वथा । कर्ता करविता तो एक ॥६७॥ यालागीं सकळ श्रोतेजन । तयांसी माझें लोटांगण । सावध करोनियां मन । श्रीरामकथन परिसावें ॥६८॥ श्रोतियांसी सावध म्हणतां । लागों पाहे उद्धतता । त्यांसी नित्यसावधानता । बोलिलों वार्ता बाळत्वें ॥६९॥ क्षमा करोनि अपराधासी । श्रीरामें सुखाविलें सर्वांसी । भेटोनि अयोध्येच्या लोकांसी । त्या निरूपणासी[४] परिसावें ॥७०॥

श्रोत्यांनी रामकथा पुढे सांगण्याची घाई केली म्हणून गावबाला उत्साह : तंव कृपाळु निजसज्जन । संतोषयुक्त अभयवचन । बोलते झाले आपण । अमृताहून सुखकारी ॥७१॥ आम्हां रामकथेचा आदर । रसाळ निरूपण साचार । सुचूं नको परिहार[५] । कथा सत्वर चालवीं ॥७२॥ एकोनि संतांचें वचन। उल्लासला चौगुण[६]। जेंवी ऐकतां घनगर्जन[७] । आनंद पूर्ण मयूरा ॥७३॥ आज्ञापिलें

---

शब्दार्थ - १. सुगंध, २. बावन, ३. ओंकाराचे ठिकाणी, ४. कथेस, ५. अडथळा, ६. चौपट, ७. मेघगर्जना.

संतोषें । तरी ऐका स्वामी सावकाशें । सकळां भेटोनि राघवेशें । सुख कैसें दीधलें ॥७४॥

श्रीरामांच्या भेटीला सर्वजण आले : भरत आणि शत्रुघ्न । वसिष्ठमुख्य[1] ऋषिगण । श्रीराममाता स्वये घेऊन । आले आपण भेटीसीं ॥७५॥ सुमंतादि प्रधान मुख्य । आले सकळही सैनिक । जनपद नागरिक । आले असंख्य भेटीसी ॥७६॥ चतुराश्रम चतुर्वर्ण । षड्दर्शनी[2] आले गहन । अखिल जातींचें जन । आले रघुनंदनभेटीसी ॥७७॥ देखतांचि रघुवीर । नि:शेष विसरले संसार । पुढें केंवी चाले व्यवहार । हाही विचार विसरले ॥७८॥ देखतांचि रघुनाथा । धाकें नि:शेष निमाली चिंता । कार्यकारणकर्तव्यता । नि:शेष चित्ता नाठवे ॥७९॥ न देखतांचि राघवासी । दंड लागला संन्याशांसी । तेही देखतां श्रीरामासी । निजदंडासी उबगले ॥८०॥ देखतां श्रीरामासी । ओंवाळूनि सांडिलें दंडासी । निष्कर्मता बाणली कैंसी । देहभावासी विसरले ॥८१॥ विसरोनि श्रीरामासी । वनस्थ वनीं झाले पिशीं । आश्रमाभिमानें गिळिलें त्यासी । नित्यकर्मासी आचरतां ॥८२॥ तेंही देखतां रघुपती । आश्रमाभिमान शीघ्रगतीं । केव्हां गेला नेणों केउती । सुखसंवित्ती श्रीराम ॥८३॥ विसरोनियां रघूत्तम । गृहस्थां होत गृहधर्म । शिश्नोदरव्यवसाय परम । व्यवसायकर्म सर्वदा ॥८४॥ तिंहीं देखतां रघुरावो । गृहधर्म झाला वावो । विषयेंद्रियांचा झाला अभावो । निजानंद पहा हो कोंदला ॥८५॥ नाममात्र ब्रह्मचारी । ब्रह्मत्व नाहीं इंद्रियांवरी । राम देखतां निर्धारीं । सत्यत्वें थोरी ब्रह्मचर्या ॥८६॥

सत्संगानेच श्रीरामदर्शनाचा अलभ्य लाभ : इतुकियासी मूळ कारण । मुख्यत्वें सत्संगचि प्रमाण । सत्संगें रघुनंदन । वोळगणा पूर्ण सर्वांगें ॥८७॥ सत्संगें साधन केलें । सत्संगें तत्व आकळलें । सत्संगाचेनि भावबळे । परब्रह्म लोळे दोंदावरी ॥८८॥ सत्संगें साधनसिद्धी । सत्संगें अढळ बुद्धी । चालतां बोलतां समाधी । जाण त्रिशुद्धि सत्संगें ॥८९॥ तो सत्संग मूर्तिमंत । श्रीरामभ्राता राव भरत । त्याचेनि संगें यथार्थ । श्रीरघुनाथ भेटला ॥९०॥ रामनामाच्या दीर्घध्वनीं । आनंदें पूर्ण झाली अवनी । नाद न समाये गगनीं । सकळां मनीं उत्साहो ॥९१॥ स्त्रीशुद्रादि चांडाळ । भरतसंगतीं तत्काळ । देखोनि रघुकुळपाळ । झाले सकळ सुखमय ॥९२॥ रंगारीं उडविलीं रावलगें । पाटवीं पाटावें[3] अनेगें । सोनारीं सुवर्णसुमनें । वेगें हर्षयोगें उडविलीं ॥९३॥ वैराळ मोत्याच्या झालरी । रत्नें उडविती जोहारी । सर्व स्वयें कुरवंडी[4] निर्धारीं । करिती गजरीं रामावरी ॥९४॥ देखोनियां रघुनाथा । सर्वस्वाचा त्याग करितां । उल्लास जनाचिया चित्ता । लोभ सर्वथा नाहीं कोणा ॥९५॥ सकळीं सकळ संपत्ती । ओवाळिली श्रीरघुपती । तरी अधिक आनंद चित्तीं । भेटीची स्थिती अवधारा ॥९६॥

श्रीरामांचे ऋषींना व मातांना वंदन : देखोनियां ऋषिवरांसी । विमान सांडोनि वेगेंसीं । उडी घातली आवेशीं । ऋषिनमनासी श्रीरामें ॥९७॥ परमात्मा स्वयें श्रीराम । तो ऋषिनमना सकाम । निष्कर्माचें निजरूप परम । द्विजोत्तम रामाचें ॥९८॥ आपण आपणासी करावी प्रीती । आपुली आपणा निजभक्ती । वाढविती अति निगुतीं । म्हणोनि रघुपति द्विज नमी ॥९९॥ गुरुदास्येंवीण तत्वतां । ठाव नाहीं परमार्था । ऐसें जाणोनि वस्तुतां । ठेविला माथा गुरुचरणीं ॥१००॥ गंगा निजओघें सर्वस्वेंसीं । येवोनि भेटे सागरासी । तेंवी रामे अति प्रीतीसीं । वसिष्ठासी नमियेलें ॥११॥ हेत ठेवोनि अर्थस्वार्थी । तीर्थव्रतादि भजन करिती ।

---

शब्दार्थ - १. वसिष्ठादिक, २. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा व वेदांत जाणणारे, ३. उंची वस्त्रें, ४. ओवाळणी.

ते जाणावी अवघी रीती । फळप्राप्ती तयां नव्हे ॥२॥ चित्ते चितेंसीं जीविता । गुरूचरणीं पैं अर्पिता । अति उल्लास ज्याच्या चित्ता । तेंचि रघुनाथाचें स्वरूप ॥३॥ येणें भावें वसिष्ठासी । रामें नमियेलें अति प्रीतीसीं । वसिष्ठें उचलोनि वेगेंसीं । निजहृदयेंसी आलिंगिला॥४॥ श्रीरामहृदया हृदय नमिलें । एकत्वें सुख पूर्ण झालें । जेंवी दीप एक झाले । भांडार उघडलें प्रकाशाचें ॥५॥ सुवर्ण आणि अलंकारा । भेटी एकत्वें उभारा । तेंवी वसिष्ठरघुवीरां । मिठी एकाकारा[१] पडियेली ॥६॥ जैसी प्रीति सद्गुरूसी । तेणें भावें सकळ ऋषी । रामें नमिलें अति प्रीतीसीं । अद्वयेसीं ब्रह्मत्वें ॥७॥ कैकेयी माता भरतासी । रामें आधीं नमिलें तिसी । येरीं आलिंगिला अति प्रीतीसीं । कोप मानसीं नेघें रामा ॥८॥ म्यां तुजसीं वैर केलें । परी त्वां रामा मनीं नाहीं धरिलें । ऐसें तुझें महिमान आगळें[२]। सुखीं केलें मजलागीं ॥९॥

उपकारिषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः । अपकारिषु यः साधुः स साधु सद्भिरुच्यते ॥६॥

कैकेयीची रामस्तुती : वनवासा धाडिलें तुज । जग निंदी म्हणोनि मज । तोंड दावितां लोक लाज । रघुराजद्वेषिणी[३] ॥११०॥ अतीत[४] अनागत[५] वर्तमान । सर्वज्ञ ज्ञाता तूं रघुनंदन । बाह्येंद्रियें क्रियाचरण । वर्तविता आन कोणी नसे ॥११॥ प्राण्याच्या माथां निमित्त जाण । वृथा ठेविती आबाल जन । चाळक वर्तवी वर्तन । कर्मे जाण तेंवी होती॥१२॥ श्रीराम राज्यासी विघ्न । करावया मी मशक कोण । राम परमात्मा परिपूर्ण । क्रिया संपूर्ण करवीत ॥१३॥

**जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिर्जानाम्यधर्मं न च मे निवृत्ति : ।**
**केनापि देवेन हृदि स्थितेन । यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ॥७॥**

कैकेयी म्हणाली तूच कर्ता-करविता आहेस : श्रीरामराज्यासी विघ्न । सर्वथा करूं नये आपण । ऐसें जाणताजाणतां पूर्ण । उपरति मन पैं नेघे ॥१४॥ स्वधर्म जाणोनि प्रवृत्ती । अधर्म जाणोनि निवृत्ती । सर्वथा न करवे निश्चितीं । याची स्थिति परयेसीं ॥१५॥ अंतरवासी कोणी एक । भविष्य जाणोनियां देख । प्राचीनसूत्र[६] अलौकिक । निजलाघवें देख नाचविता ॥१६॥ त्या सूत्राचेनि बळें जाण । उत्तम मध्यम अधम जन । निजसत्ता नाचवी पूर्ण । होय वर्तन तदनुरूप ॥१७॥ प्राचीनाची चाळकता । कर्म कार्य कर्तव्यता । तुजअधीन रघुनाथा । कर्ता करविता तूंचि तूं ॥१८॥ ब्रह्मा धरोनि मुंगीवरी । राम चाळक चराचरीं । तो माझे दुष्टाचारीं । केंवी निर्धारीं आन होईल ॥१९॥ राम चाळक इंद्रियांचा । राम वाचक वाचेचा । राम कल्पक मनाचा । बोध बुद्धीचा श्रीराम ॥१२०॥ राम चित्ताचें चेतव्य । राम अहंकारा अहंभाव । प्राणमर्यादेची धांव । स्वयें स्वयमेव श्रीराम ॥२१॥ तेथें सत्कर्म असत्कर्म । कर्ता स्वयें श्रीराम । जेथें निपजे जो धर्माधर्म । सुखदुःखादि परम परिपाक ॥२२॥ भोग्य भोग आणि भोक्ता । स्वयें श्रीरामचि तत्वतां । तेथें आमचे माथां कर्तव्यता । केवी रघुनाथा येईल ॥२३॥ कर्ता कार्य कर्माचरण । स्वयें तूंचि तूं आपण । वनवासासी बुद्धि दारुण । तुवांचि जाण प्रेरिली ॥२४॥ जावोनियां वनवासासी । निर्दाळावें राक्षसांसी । सोडवावें सुरवरांसी । नवग्रहांसी सोडवावे ॥२५॥ दंडकारण्य करोनि मुक्त । द्विजवरां सुख अदभुत । संस्थापोनि शरणागत । त्रैलोक्यांत निजविजयी ॥२६॥ इतुकें चरित्र तत्वतां । तुज करणें होतें रघुनाथा । वृथा अपराध माझे माथां । जगनिंद्यता कां केली ॥२७॥ समर्थ करीतसे बरवें । त्यासी काय कोणें म्हणावें । अपेश कैकेयीनें भोगावें । कीर्ति राघवें विजयाची ॥२८॥

शब्दार्थ -: १. एकत्वाने, २. अधिक थोर, ३. रामाचा द्वेष करणारी, ४. होऊन गेलेले, ५. पुढें होणारे, ६. पूर्वार्जित दैव.

**श्रीरामांचें कैकेयीला वंदन व तिची स्तुती :** ऐसे बोलतां कैकेयीसी । निजखूण पावली रामासी । घालोनि लोटांगण मातेसी । निजहृदयेंसीं आलिंगिली ॥२९॥ तूं आमची निजमाता । तुझेनि कीर्ति रघुनाथा । जगदुद्धाराची कथा । जाण तत्वतां तुझेनि ॥१३०॥ आपणावेगळे आम्हांसी । जरी न करिसी परियेसीं । तरी कोण पुसतें आम्हांसी । कीर्ति रामासी तें कैंची ॥३१॥ तुंवा देवोनि आशीर्वचन । करविलें वनप्रयाण । तेणें झालें परम पावन । कीर्ति गहन तिही लोकीं ॥३२॥ तुझेनि मुक्त दंडकारण्य । तुझेनि वधिले रक्षोगण । तुझेनि निवटिला रावण । सुरमोचन तुझेनि ॥३३॥ तुझी प्रीति आम्हावरी । सापत्नभावें[1] लोकाचारीं । कृपेनें धाडितां वनांतरी । ब्रह्मांडभरी कीर्ति माझी ॥३४॥ मज मानिती सकळ जन । ते तुझी कृपा पूर्ण । तयां दोघांचा संवाद जाण । निजबोध गहन जगासी ॥३५॥ रामें घालोनि लोटांगण । कैकेयी आलिंगिली पूर्ण । यश जोडलें संपूर्ण । रघुनंदन जगद्वंद्य ॥३६॥ कैकेयी श्रीरामाचें वचन । ऐकतांच तत्क्षण । उडालें कर्मकर्तेपण । निराभिमान निजबोध ॥३७॥ ऐसा बाणला वचनार्थ । धर्मचाळक रघुनाथ । वृथाभिमान धरितां येथ । नरकपात अभिमानें ॥३८॥ कैकेयीवचनें तत्वतां । सर्व कर्मी निष्कर्मता । स्वयें बाणली तत्वतां । श्रीरघुनाथाचेनि धर्में ॥३९॥ पुढें होवोनि रघुनंदन । कौसल्येसी केलें नमन । येरीं आलिंगोनि पूर्ण । केलें अवघ्राण[2] मस्तकीं ॥१४०॥

**कौसल्यां च सुमित्रां च कैकेयीमभ्यवादयत् । मूर्धन्याधाय कौसल्या तावुभौ रामलक्ष्मणौ ॥८॥**
**अंके सीता समारोप्य बाष्पमानंदहर्शजम् ॥९॥**

**कौसल्यादि सर्वांना श्रीरामांचे नमन :** परमप्रिय दशरथासी । जिचेनि कीर्ति श्रीरामासी । आधीं नमूनि ते कैकेयीसी । मग कौसल्येसी नमियेलें ॥४१॥ तैसेचि सुमित्रेसी आदरें । स्वयें नमिलें रघुवीरें । जानकी जाण सौमित्रें । माता सत्वर नमियेल्या ॥४२॥ श्रीरामासी देतां आलिंगन । वियोगदु:खक्लेश दारुण । नि:शेष[3] गेले हारपोन । समाधान जीवशिवां ॥४३॥ कौसल्येनें जानकी । प्रीतीं बैसविली अंकीं । अवघ्राण मस्तकीं । केलें तिघांसी कौसल्या ॥४४॥ सकळ जन अयोध्यावासी । प्रीतीं भेटों आले श्रीरामासी । श्रीरामें त्यांचिये भेटीसी । युक्ति कैसी योजिली ॥४५॥ मजलागीं आर्तभूत । भरतसंगतीं निश्चित । सकळ झाले व्रतस्थ । सुखी त्यातें करावें ॥४६॥ त्यांसी न देतां आलिंगन । सकळ होती दु:खमग्न । पृथक् पृथक् देतां पूर्ण । अति विलंबन लागेल ॥४७॥ एकेंचि काळें सकळांसी । आनंदवावें उल्हासीं । तरीच सुख वाटेल त्यांसी । दु:खराशी अन्यथा ॥४८॥ यांसी न देतां आलिंगन । व्यापकत्वा पडे खान[4] । आर्तबंधु[5] हें अभिधान । वृथाचि जाण होऊं पाहे ॥४९॥ श्रीराम लाघवी निर्धारीं । प्रकाशोनि सकळांतरीं । कैसी केली नवलपरी । निजनिर्धारीं परिसावे ॥१५०॥ अंतरीं प्रवेशोनि आपण । मनचि राम झालें पूर्ण । मग जें जें दिसे दृश्य भान । तें तें जाण श्रीराम ॥५१॥ सकळांतरीं प्रवेशोन । सकळरूपें झाला आपण । जो ज्यासी दे आलिंगन । तेथेंचि जाण श्रीराम ॥५२॥ भरत शत्रुघ्न ऋषीश्वर । नागरिक जन समग्र । एक वेळे लहानथोर । स्वयें रघुवीर दिसतसे ॥५३॥ पामर जो कां चांडाळादिक । सदाचार आणि श्वपाचक[6] । राम दिसे एकाएक । अलोलिक लाघव ॥५४॥ अयोध्येच्या तृणचरा गायी । श्रीराम दिसे त्यांच्या ठायीं । व्याघ्र सर्प क्रूर पाहीं । त्यांच्या ठायीं श्रीराम ॥५५॥ वृक जंबुकादि वृश्चिक । पक्षिआदि श्येन काक । कृमिकीटक पतंगादिक । एक एक राम झाले ॥५६॥

---

शब्दार्थ – १. सवतीमत्सराने, २. वास घेणे, ३. सर्व, ४. उणेपण, ५. दीनबंधू, ६. कुत्र्याचें मांस शिजविणारा, ७. कल्पून.

द्रुम पर्वत पाषाण । गिरिकंदरें वन कानन । स्थावर जंगम संपूर्ण । रघुनंदन स्वयें दिसे ॥५७॥ दृश्यमात्रीं रघुनंदन । देखता दृश्याचें भान । सर्वथा उडालें संपूर्ण । चैतन्यघन कोंदलें ॥५८॥ श्रीरामरूपें आलिंगन । परस्परें देती आपण । विश्वरूप जाहला पूर्ण । सर्वांतरी आपण प्रगटोनी ॥५९॥ माता भेटे पुत्रासी । राम म्हणोनि आलिंगी त्यासी । माता न देखोनि पुत्रासी । अति प्रीतीसीं आलिंगित ॥१६०॥

परस्परांचे प्रेमालिंगन : बंधु देखोनि भगिनी । प्रीतीं आलिंगी राम भावूनी । येरें बंधुपण विसरोनी । रघुनंदनीं आलिंगन ॥६१॥ पिता पुत्रासी पुत्र पित्यासी । कन्या मातापितरांसी । विसरोनि अहंममतेसी । श्रीरामासी आलिंगत ॥६२॥ स्त्रीतें आलिंगित निजभर्ता । श्रीराम भासे तत्वतां । प्रियातें[1] आलिंगितां कांता । श्रीरघुनाथा भेटी होय ॥६३॥ सासरा आणि जांवई । अति प्रीतीं लवलाहीं । रामरूपें भेटती पाहीं । लज्जा ठायीं निमाली ॥६४॥ सासू देखोनि जांवयासी । राम म्हणोनि निजावेशीं । प्रीतीं मिठी घातली तिसी । लाज मानसीं येवों न शके ॥६५॥

परस्परांच्या आलिंगनाने सर्वांना आनंदीआनंद : आदिकरोनि दासदासी । रामरूपें आलिंगन त्यांसी । रामें विसरविलें देहासी । स्वामिसेवकांसीं श्रीराम ॥६६॥ पशु जे कां तृणचर । तिर्यगादि[2] योनि समग्र । कृमिकीटकादि विचित्र । भेटीं रघुवीर सुखावे ॥६७॥ आलिंगनें परस्परीं । श्रीरामरूपें निर्धारी । देते झाले अत्यादरीं । प्रीती थोरी श्रीरामीं ॥६८॥ राम म्हणोनि परस्परीं । खांदा घेती अत्यादरीं । नृत्य करिती हर्षे थोरीं । देहविसरी स्वानंदे ॥६९॥ द्विज सुखावले अवघे । झेलिती गोपीचंदनरवे । धोत्रें झेलिती घडीपालवें[3] । बंदी राघवें सोडविले ॥१७०॥ नागरिक जन समस्त । त्यांसी भेटला रघुनाथ । होवोनियां आनंदभरित सकळीं नृत्य मांडिलें ॥७१॥ हर्ष दाटला सकळांसी । कोणी नोळखे कोणासी । श्रीरामें अवघीं केलीं पिसीं । आपआपली कैसीं नाचती ॥७२॥ वानर मानव समग्र । अवघे झाले एकत्र । अवघीं केला जयजयकार । श्रीरघुवीर निजविजयी ॥७३॥ राम सौमित्र सीता सती । तिघे भेटलीं एकस्थितीं । आनंदविलें सकळांप्रती । श्रीरघुपति कृपाळु ॥७४॥ सुग्रीव आणि बिभीषण । श्रीरामें हातीं धरोनि जाण । करविलें वसिष्ठनमन । येरें आलिंगन दीधलें ॥७५॥

भरतभेट व आलिंगन : तैसेचि सकळ ऋषिगण । त्यासीं करोनियां नमन । मातांसी घालोनि लोटांगण । भरता आलिंगन दीधलें ॥७६॥ नळ नीळ अंगद जांबवंत । सुषेणदधिमुखादि समस्त । हातीं धरोनियां रघुनाथ । भेटवीत भरतासी ॥७७॥ भरत लागला पायांसी । तुम्ही साहाकारी श्रीरामासी । निवटोनियां लंकेशासी । निजविजयासी दीधलें ॥७८॥ तुमचेनि श्रीरामासी कीर्ती । तुमचेनि अमरां बंदिमुक्ती । सोडवोनियां सीता सती । श्रीरघुपती भेटविली ॥७९॥ ऐकोनि भरताचें बोलणें । सकळीं घातलीं लोटांगणें । त्रैलोक्य पावन रघुनंदने । विजयी होणें त्याचेनि ॥१८०॥ श्रीरामें पावन तीर्थ । श्रीरामें पावन व्रत । श्रीरामें याग पुनीत । येरवीं पूर्ण व्रत अपायी[4] ॥८१॥ श्रीरामें क्षेत्र पावन । श्रीरामें पावन ध्यान । श्रीरामें पावन दान । येरवीं पूर्ण अपायी ॥८२॥ चुकोनियां[5] श्रीरघुनंदन[5] । जें जें कीजे कर्माचरण । तें ते निश्चयें अनर्थी जाण । राखता कोण तयासी ॥८३॥ श्रीरामेंवीण क्रिया घडे । तेथें अपाय रोकडे । चुके ठके विकळ पडे । पतन गाढें तयासी ॥८४॥ ऐसें परस्परें जाण । अंतरप्रीतीं आलिंगन । देवोनियां

---

**शब्दार्थ** – १. आपल्या पतीला, २. पशुपक्षी वगैरे, ३. घडीचे पदराची, ४. विघ्नांनी युक्त, ५. रामावाचून.

स्तविती रघुनंदन । प्रेम गहन श्रीरामीं ॥८५॥ तेणें डोलत रघुनंदन । हांवोनियां सुखैकघन । निजभक्तांचा प्रेमा गहन । प्रेमें पूर्ण प्रीति रामा ॥८६॥ पुढील कथानुसंधान । श्रीरामाचें अभिषिंचन । अत्यंत गोड निरूपण । एका जनार्दना विनवित ॥८७॥ जनीं जनार्दन देख । जनार्दनीं सकळ लोक । ऐसा निश्चय जो सम्यक । जाणे नि:शेख आपणासी ॥८८॥ त्यासी कथा रामामृत । निश्चयें कळलें यथार्थ । त्याचा भोक्ता तोचि एक । जो कथामृतचवी जाणे ॥१८९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामभरतदर्शनं नाम एकाशीतिमोऽध्याय: ॥८१॥ ओंव्या ॥१८९॥ ॥ श्लोक ॥१॥ एवं ॥१९८॥

## अध्याय ब्याऐंशीवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नम: ॥

### श्रीरामांना राज्याभिषेकाचा निर्णय

**भरताची श्रीरामांना प्रार्थना :** भेटोनियां सकळांसी । भरत आला रामापासीं । करोनि साष्टांग नमनासी । लोटांगणेंसीं राम वंदिला ॥१॥ बद्धांजलि विनयवृत्ती । भरत सत्वें सत्वमूर्ती । विनविता झाला श्रीरघुपती । मधुरोक्तीं[1] नम्रत्वें ॥२॥ श्रीरामा तुजवीण । झालों होतों अति दीन । मृतप्राय कलाहीन । जीवनेंवीण जेंवी धान्य ॥३॥ भ्रतारेंवीण जेंवी कांता । उपहत[2] जैसी सर्वथा । शृंगारभोग सकळ वृथा । तेंवी रघुनाथा तुजवीण ॥४॥ मातृहीन पैं बाळक । मृतप्राय दिसे देख । नाहीं बाळसें कैंचें सुख । स्तनपान नि:शेख असेना ॥५॥ तुजवांचोनियां रघुनंदन । तैसी आमची दशा पूर्ण । केवळ भूमिभार जाण । मागों मरण तरी न ये ॥६॥ जितां जीववेना रामेंवीण । काळावांचोनि न ये मरण । सर्वांगी तळमळ पूर्ण । जेवितां अन्न रुचेना ॥७॥ केवळ माझीच नव्हे अवस्था । आदिकरोनि तुझ्या माता । अयोध्येच्या जनां समस्तां । दुखावस्था अनिवार ॥८॥ त्या दु:खाचा परिहार । आजि झाला समग्र । देखोनियां रघुवीर । आनंदपूर लोटला ॥९॥

अद्य मे सफलं जन्म सफलश्च मनोरथ: । यत्त्वां पश्यामि राजानमयोध्यां पुनरागतम् ॥१॥

**भरताने जन्म सफल झाल्याचे रामांना सांगितले :** श्रीरामदर्शनेंकरून । वियोगदु:ख गेलें पूर्ण । प्रेमाश्रुपूर्ण झाले नयन । बाष्पेंकरून दाटला कंठ ॥१०॥ त्यातें आवरोनि तत्वतां । जिरवोनियां सत्वावस्था । चरणीं ठेवोनियां माथा । श्रीरघुनाथा विनवित ॥११॥ अमितां जन्मांचे दु:ख । जननीजठरीं येवोनि देख । निमोनि गेलें सकळिक । रघुकुळटिळक देखिलिया ॥१२॥ सकळ जन्मांची सार्थकता । आजि झाली गा तत्वतां । तुज देखोनियां रघुनाथा । उत्तीर्णता जन्माची ॥१३॥ श्रीरामाचें विस्मरण । तेथें प्रतिपदीं मरण । तो देखतां रघुनंदन । सर्वथा मरण निमालें ॥१४॥ मृत्यूचा मृत्यू रघुनंदन । त्यासी देखतां निमालें मरण । येणें जन्में जन्मनिवारण । निजात्मा रघुनंदन देखिला ॥१५॥ रामदर्शनें जन्म सफळ । राम दर्शनें सफळ कुळ । रामदर्शनें पावन सकळ । व्रत सुशीळ श्रीरामें ॥१६॥ श्रीरामेंसीं नव्हे भेटी । तंवचि व्रताची आटाआटी । तंवचि पुरश्चरणें कोटी । श्रीराम दृष्टी जंव न पडे ॥१७॥ विसरोनियां रघुराया । जे जे केली तपश्चर्या । साधनाभिमानें गिळिले माया । श्रमचि वायां वाढविला ॥१८॥

---

शब्दार्थ - १. गोड वाणीनें, २. हतभाग्य.

**स्मरणभक्तीचे सामर्थ्य :** अनिमिष जें रामस्मरण । तें उग्र तप दारुण । स्मरणापरतें निजसाधन । सर्वथा आन असेना ॥१९॥ स्मरणाविरहित साधनभक्ती । ते जाणावी अवघी भ्रांती । नटाचेपरी वृथा नटती । जीविकावृत्तिसाधनें[1] ॥२०॥ जेथें वस्तूचें विस्मरण । त्यातें साधन मानी कोण । जपतपादि व्रत दान । स्मरणें जाण सार्थक ॥२१॥ तीं आमुचीं सकळ व्रतें । श्रीरामस्मरणें सनाथें । प्रसन्न होवोनि समस्तें । श्रीरामातें भेटविलें ॥२२॥ निवटोनियां लंकानाथ । त्रैलोक्यविजयी रघुनाथ । आम्हीं देखिला अयोध्येआंत । व्रतें समस्त आजि फळलीं ॥२३॥ स्मरण कीर्तन रघुनाथा । अनिमिष तुझें ध्यान करितां । जना अखंड सुखावस्था । तिन्ही अवस्था नासती ॥२४॥ श्रीरामकीर्ति मकरंद[2] । झेंपावले कृष्णषट्पद[3] । गुंजारत अति साल्हाद । निजानंद सेविती ॥२५॥ श्रीरामा तुझ्या कीर्तीपासीं । संत भ्रमर दूरवासी । तेहीं ऐकोनि वेगेंसीं । उडी आपैसीं घालिती ॥२६॥ स्वर्गमृत्युपाताळवासी । साधु जे कां अति तापसी । तेही सांडून तपश्चर्येसी । रामकीर्तीसी ठाकून आले ॥२७॥

अवेक्ष्य तु भवान्कोशं गोष्ठागारं तु पुष्कलम् । भवतस्तेजसा सर्वं कृतं च द्विगुणं मया ॥२॥
तथा ब्रुवाणं भरतं दृष्ट्वा तं भक्तिवत्सलम् । मुमुचुर्वानरा नादंनागराश्च जनास्तदा ॥३॥
ततः प्रहृष्टं भरतमंकमारोप्य राघवः । ययौ तेन विमानेन ससैन्यो भरताश्रमम् ॥४॥

**भरताने केलेली श्रीरामस्तुती ऐकून वानरांचा आनंद :** श्रीरामकीर्ति अत्यद्‌भुत । साधुसंतसमवेत । अयोध्यानगरीं अत्यंत । अपरमित वस्ती झाली ॥२८॥ पहावें स्वामी रघुपती । पहिली अयोध्या होती किती । आतां किती जाहली वस्ती । श्रीरामकीर्ती ख्याति केली ॥२९॥ श्रीरामकीर्तीचें महिमान । ऐकोनियां भरतवचन । हरिखले वानरगण । भुभुःकारें पूर्ण गर्जिन्नले ॥३०॥ भुभुःकार जयजयकार । माजि रामनामाचा उच्चार । किराणें देती अपार । श्रीरघुवीर-जयजयकीर्ती ॥३१॥ तें देखोनि अलोलिक । अयोध्यावासी एकएक । नामें गर्जिन्नलें असंख्य । श्रीरघुकुळटिळक विस्मित ॥३२॥ देखोनि भरताच्या प्रेमासी । सुख उथळलें श्रीरामासीं । जेवीं चंद्रोदयीं आकाशीं । सागरासी ये भरतें ॥३३॥ सागर एकदेशी[4] जण । तरिया[5] दाटती तेणें भरतेन । श्रीराम स्वयें चैतन्यघन । ब्रह्मांड पूर्ण सुखें धालें ॥३४॥ श्रीराम स्वयें सुखैकघन । तथापि प्रेम अति गहन । हृदयीं धरोनि भरता जाण । श्रीरामें आपण आलिंगिला ॥३५॥

**श्रीरामांनी भरत, वसिष्ठ व मातांना विमानात बसविले :** वसिष्ठादिक ऋषींसमवेत । विमानीं बैसोनि रघुनाथ । अंकी बैसविला भरत । प्रेम अद्‌भुत भक्तीचें ॥३६॥ वामांकीं जानकी सुंदरी । भरत विराजे दक्षिण अंकावरी । समस्त माता रघुवीरीं । विमानाभीतरीं बैसविल्या ॥३७॥ सेनापति आदिप्रधान । त्यातें आज्ञापी रघुनंदन । निजवहनीं आरोहण । स्वयें आपण करावें ॥३८॥ ऐकोनि रामाचें वचन । अवघे झाले सुखैकघन । जयजयकारें गर्जोन पूर्ण । केलें आरोहण निजवहनीं ॥३९॥ गज रथ वाजी[6] वहनें । आपुलालीं आरोहणें । सौमित्रासहित शत्रुघ्नें । विमानीं रघुनंदनें विराजिजे ॥४०॥

**मोक्षपुरी अयोध्येचे आध्यात्मिक रूपक :** सांडोनि देहत्रिकूट । चौथें पैणें घडघडाट । मोक्षपुरी अयोध्यापीठ । झाले प्रविष्ट पैं तेथें ॥४१॥ श्रवण मनन निदिध्यासन । चौथा साक्षात्कार पूर्ण । हींचि चारी पेणी[7] पूर्ण । ऐका विवंचन तयांचें ॥४२॥ पहिलें पेणें रामेश्वरीं । दुसरें अग्रहार रामनगरीं । तिसरें भारद्वाजश्रमाभीतरीं । मोक्षपुरी पैं चौथी ॥४३॥ आत्माराम सर्वें असतां ।

---

**शब्दार्थ –** १. जीविकेच्या साधनानें, २. मध, ३. काळे भुंगे, ४. अल्पव्यापी, ५. नौका, ६. घोडे, ७. मुक्काम.

श्रवण मनन कोण्या अर्था । ऐसा आशंकेचा ठाव आतां । परी सर्वथा न धरावा ॥४४॥ जीवा आत्मयासीं वेगळीक । कल्पांतीही नाहीं देख । निजभ्रमें भेद आवश्यक । एकाएक पैं भासे ॥४५॥ जेंवी विसरोनि जागृतीसी । स्वप्नभ्रमें कासाविसी । स्वयें होय अनायासीं । सावध त्यासी केलिया नव्हे ॥४६॥ तेंवी जीवा आत्मयाची एकात्मता । स्वत:सिद्ध स्वयें असतां । श्रवण मनन न करितां । भ्रम सर्वथा निरसेना ॥४७॥ चौथें पेणें रघुनंदन । स्वयं पावला निजभवन । बंधुबंधूं आलिंगन । जीवशिव पूर्ण जेंवी भेटती ॥४८॥

भरताच्या आश्रमाला येताच रामांना परमानंद : आपुलाले निजवहनीं । आरूढोनि तत्क्षणीं । रामनामाचे दीर्घध्वनीं । करित गर्जन चालिले ॥४९॥ आले भरतआश्रमासी । तेथें उतरिले विमानेंसीं । आश्रम देखतां राघवासी । प्रेम मानसीं[१] न संडे[१] ॥५०॥

आश्रमाचे व भरताचे वर्णन : देखे दर्भांचीं आसने । तृणशेजा शयनस्थानें । प्रावरणासी कृष्णाजिनें[२] । आणि वल्कलें बहुवस ॥५१॥ फळमूळांचें संभार । देखे आश्रमीं अपार । उदंड मिनले ऋषीश्वर । त्यांसी फळाहार करावया ॥५२॥ भरतमुखें रामकथा । अत्यंत प्रेमें श्रवण करितां । धणी न पुरे ऋषी समस्तां । आश्रमीं त्या अर्था मीनले ॥५३॥ देशोदेशींचे ऋषी जाण । निजाश्रम त्यागूनि पूर्ण । भरतापासीं आले ठाकून । करावया श्रवण रामकथा ॥५४॥ भरताश्रम रघुनाथा । स्वयें देखतांचि तत्वतां । अति उल्लास झाला चित्ता । प्रेमावस्था अनिवार ॥५५॥ वनवासीं जीं जीं व्रतें । होतीं धरिलीं रघुनाथे । तीं तीं समस्तें भरतें । प्रेमें अद्भुतें अंगीकारिलीं ॥५६॥ माथां दृढ जटाभार । पादुकामंडित परिकर । खपाटीं लागलें उदर । वल्कलांबरपरिधान ॥५७॥ निजवृत्तिअलंकृत । श्रीरामें देखोनियां भरत । सुख झालें अत्यद्भुत । निजहृदयांत आलिंगी ॥५८॥ श्रीरामाचेनि आलिंगनें । सुख उथळलें चौगुणें । सर्वस्वें ओंवाळिलें तेणें । निंबलोणें कुरवंडिया ॥५९॥ भरताश्रमा येवोनि निरुतें[३] । सुखावले निजचित्तें । आज्ञापिलें श्रीरघुनाथें । सावध चित्तें परिसावें ॥६०॥

**अब्रवीच्च तदा रामस्तद्विमानमनुत्तमम् । वह वैश्रवणं देवमनुजानामि गम्यताम् ॥१॥**

आपले कामग विमान आपणास परत मिळावे अशी कुबेराची अपेक्षा : निवटोनियां लंकनाथ । सुर सोडविले समस्त । निजवैभवासमवेत । झालें प्राप्त निजभवन ॥६१॥ कुबेराचें निजविमान । कामग अति शोभायमान । रावणें आणिलें हिरोन । दुःखीं निमग्न तेणें तो ॥६२॥ निवटोनियां लंकेशासी । संस्थापिलें सकळांसी । मुक्त केलें नवग्रहांसी । परी आपणासी उपेक्षिलें ॥६३॥ माझें कामग विमान । मज देता रघुनंदन । तरी मी जाणतों संपूर्ण । कृपाळुपण रामाचें ॥६४॥ ज्याचा जेथें अतिशयो[४] पूर्ण । तें त्यासी न पावतां जाण । स्वयें होवोनि दु:खनिमग्न । बोले पैशून्य[५] सर्वदा ॥६५॥

लोभमहिमा : जेथे दृढत्वें लोभाची वस्ती । तेथें कैंची विवेकस्थिती । अंध होवोनि ठाके वृत्ती । दृढ विषयार्थी लोभिष्ठ ॥६६॥ लोभ तेथें कैंचें ज्ञान । लोभ तेथें कैचें ध्यान । लोभ तेथें समाधान । सर्वथा जाण पैं नाहीं ॥६७॥ लोभ तेथें कैंची भक्ती । लोभ तेथें कैंची मुक्ती । जेथें लोभ तेथें विरक्ती । नाही निश्चितीं सर्वथा ॥६८॥ लोभाचें ठाणें अंतरीं असतां । समूळ साधनें होती वृथा । गुरूसी चाळी विकल्पता । ज्याचेनि तत्वतां मोक्ष लाभे ॥६९॥ माता पिता इतर जन । त्यांची कथा गणी कोण । हें लोभाचे स्वाभाविक चिन्ह । कुबेर जाण नव्हे

---

शब्दार्थ – १. न सावरे, २. हरिणांची कातडी, ३. खरोखर, ४. प्रीती, ५. न्यून.

तैसा ॥७०॥ तथापि ज्याची वस्तु त्यासी । पावविता श्रेय[1] आम्हांसी । विमान अर्पावें कुबेरासी । हेंचि आम्हांसी निजमंडन[2] ॥७१॥

कुबेराचे विमान बिभीषणाला दिल्यामुळे स्वत:चे विमान कुबेराला देण्याची रामांची इच्छा : कुबेराचें निजविमान । शरणागता दिधलें दान । आमुचें कामग सुलक्षण । करावें अर्पण धनदासी ॥७२॥ आज्ञापितां रघुनाथ । भरतें वंदिला वचनार्थ । निर्लोभ शुद्धशास्त्रार्थ । निजसिद्धार्थ श्रीरामा ॥७३॥

श्रीरामांच्या इच्छेप्रमाणे त्यांचे विमान भरताने आपल्या दूताबरोबर कुबेराकडे पाठवून दिले : भरताचेनि भजनें पूर्ण । दूता त्रिलोकीं गमन । त्यासी करोनि आज्ञापन । धाडिलें विमान कुबेरासी ॥७४॥ उत्तरेचा लोकपाळ । अलकावती नगर विशाळ । श्रीरामभांडार सकळ । राखे अविकळ कुबेर ॥७५॥ तेथें जावोनियां दूत । सांगितलें श्रीरामवृत्त । विमान अर्पोनियां त्वरित । आज्ञा पुसत कुबेरा ॥६७॥ देखोनि श्रीरामगण । येरें घातलें लोटांगण । देखतां श्रीरामविमान । आनंदमग्न पैं झाला ॥७७॥

कुबेराकडून दूताचा सत्कार व रामस्तुती : श्रीरामरूपें रामगणासी । षोडशोपचारीं परियेसीं । पूजोनियां अति प्रीतीसीं । काय तयासी बोलत ॥७८॥ श्रीराम सकळांची माउली । आर्त श्रांतांची साउली । आश्रितजनां कल्पवल्ली । ख्याति केली अवतारी ॥७९॥ निवटोनियां दुष्ट रावण । गौरविले सकळ सुरगण । मजलागोनि स्वविमान । अर्पिलें आपण रघुनाथें ॥८०॥ भक्तजनां कृपाळ । ऐसा ब्रीदाचा[3] कल्लोळ । साच करोनि दावी तत्काळ । निजभक्त सकळ गौरविले ॥८१॥ ऐसें करोनि स्तवनासी । पूजोनियां अति प्रीतीसीं । बोळविलें श्रीरामगणासी । कुबेर मानसीं सुखमय ॥८२॥

श्रीराम दशरथाच्या सिंहासनास वंदन करण्यास निघाले : येरीकडे रघुनंदन । प्रवेशोनि स्वभुवन । दशरथाचें सिंहासन । नमावया जाण निघाला ॥८३॥ तुरें[4] लागलीं घनदाट । उठला नाद अचाट । नादें गर्जती सुभट । कीर्ति निर्दुष्ट[5] रामाची ॥८४॥ विचित्र वाद्यांचा ध्वनी । रामनामाच्या दीर्घ श्रेणी । नाद कोंदला गगनीं । वीर तेथोनी चालिले ॥८५॥ निराळ[6] वोळलें[7] नामेंकरोनी । वर्षो लागलें अमृतकणीं । हर्षे तिंबली[8] अवनी । सुखसमाधानी श्रीराम ॥८६॥

सुवासिनींकडून श्रीरामांची मंगल दीपांनी ओवाळणी : हर्षाचेनि गदारोळें । नगरवनितांहीं मंगल केलें । दधिमधुअक्षतादूर्वामेळें । दीप प्रबळें ओवाळिती ॥८७॥ ऐसे पातले राजभवन । गजरें करोनि ससैन्य । करोनियां नीराजन । सिंहासन नमियेलें ॥८८॥

पितुर्भवनमासाद्य प्रसाद्य सुमहद्यश: । कौसल्यां च सुमित्रां च कैकेयीमभ्यवादयत् ॥६॥

वाद्यांच्या गजरांत श्रीरामांचा राजभवनात प्रवेश : प्रसन्नोन्मुख तिघी माता । श्रीरामें नमिल्या तत्वतां । सहित सौमित्र आणि सीता । आनंद समस्तां उथळला ॥८९॥ श्रीराम प्रवेशतां राज-भवन । तुरे वाद्यें गर्जे गगन । नामें कोंदलें त्रिभुवन । जयजयकार पूर्ण प्रवर्तला ॥९०॥ नागरिक जना सकळां । नरनारी अबळां बाळां । तृणचरादि सकळां । देखोनि घननीळा आनंद ॥९१॥

नागरिकांची रामराज्याभिषेकाची इच्छा : सकळ जन नगरवासी । आदिकरोनि दासदासी । राज्याभिषेक राघवासी । पट्टावयासी इच्छिती ॥९२॥ ऐसें सकळांचें मनोगत । त्याहूनि भरताचें अत्यंत । राज्याभिषेकीं रघुनाथ । देखां इच्छित अत्यादरें ॥९३॥

अथाब्रवीद्राजपुत्रो भरतं धर्मिणां वरम् । अर्थोपहितया वाचा मधुरं रघुनन्दन ॥७॥

---

शब्दार्थ – १. कल्याण, २. मोठें भूषण, ३. कीर्तीचा, ४. वाद्ये, ५. दोषरहित, ६. आकाश, ७. भरले, ८. भिजली.

ती इच्छा भरताने श्रीरामांना निवेदन केली : सत्वाथिला[1] अति सात्विक । परमधर्मे अति धार्मिक । श्रीरामभजनविश्वासक । निजरंक रामभजनीं ॥९४॥ सकळांसमवेत हर्षनिर्भर । होवोनि अत्यंत नम्र । लोटांगण अत्यादर । भरतें रघुवीर विनविला ॥९५॥ वनवासाचीं सकळ व्रतें । स्वामी विसर्जावीं समस्तें । जटाबंधनें करोनि मुक्तें । मंगलस्नानातें करावें ॥९६॥ करोनि व्रतविसर्जन । राज्याभिषेक घेवोनि पूर्ण । अंगीकारावें सिंहासन । राजचिन्ह छत्रादि ॥९७॥ अति सुकुमार जानकी माता । उपवासें गांजिली तत्वतां । मलिन अंग मलिन माथा । अस्थिपंजरता उरलीसे ॥९८॥ मलिन वस्त्र कृशोदर । तांबूलहीन म्लान वक्त्र । श्रमेंकरून लागले नेत्र । बहुत सुंदरी गांजिली ॥९९॥ दुरात्मा रावणाच्या घरीं । अत्यंत गांजिली सुंदरी । मंगलस्नानीं आज्ञा करीं । दीनोद्धारी नाम तुझें ॥१००॥ तैसाच सौमित्र भ्राता । बहु कष्टला रघुनाथा । आहार नातळे सर्वथा । तुज तत्वतां सेविलें ॥१॥ त्या श्रमाचा परिहार । कर्ता तूं एक रघुवीर । अंगीकारोनि राज्यभार । सुख सत्वर यासी द्यावें ॥२॥

रामआज्ञेप्रमाणे आपण चौदा वर्षे राज्य केल्याचे भरताने रामांना सांगितले : आणिक एक विज्ञापन । स्वामींनी ऐकावें सावधान । तुझे आज्ञेप्रमाणें पूर्ण । राज्यशासन पैं केलें ॥३॥ पितृआज्ञा तुझें व्रत । झालीं चौदा वर्षे नियत[2] । तितकियांत कीर्ति अद्‌भुत । त्रैलोक्यांत विस्फारिली॥४॥ निवटोनियां रक्षोगण । मुक्त करोनियां जनस्थान । ब्राह्मणां दिधलें दान । न लागतां क्षण श्रीरामा ॥५॥ जो नागवे सुरासुरीं । कांखे सूदला[3] दशशिरीं । त्या वाळीची केली बोहरी । एकें बाणेंकरीं श्रीरामा ॥६॥ मुक्त करोनि किष्किंधाभवन । सदा राज्याभिषिंचन । सुग्रीवासी केले जाण । निमिषेंकरोन श्रीरामा ॥७॥ सागरीं तारोनि पाषाण। क्षणें उतरिले वानरसैन्य । लंकेमाजी घालोनि खाण[4] । सकुळ रावण निर्दाळिला ॥८॥ मुक्त करोनि सुरमांदी । संस्थापिले निजपदीं । नवग्रह हर्षानंदीं । स्थापिले त्रिशुद्धीं ग्रहचक्रीं ॥९॥ अलोलिक लंकाभवन । क्षणें हिरोनियां जाण । बिभीषणा दिधलें दान । संपत्ति गहन समवेत ॥११०॥ निर्लोभी कळा ऐसी । आचार्यत्व दृढ जगासी । संस्थापिलें निजभजनासीं । कृपाळुत्वेंसीं श्रीरामा ॥११॥

आमच्यासाठी राज्याचा स्वीकार करावा अशी भरताची रामांना कळकळीची प्रार्थना : त्या तुज राज्याची आस्था । सर्वथा नाहीं रघुनाथा । आमचे कृपेलागीं तत्वतां । राज्यभार आतां अंगीकारीं ॥१२॥ सिंहासनीं सचिन्ह देख। सालंकृत रघुकुळटिळक। आमचे नेत्र आत्यंतिक। देखावया भुकेले ॥१३॥ आमच्या नेत्रांचे पारणें[5] । स्वामी फेडावें कृपाळुपणें । मी तुझें निजतान्हें । लळे पाळणें पैं माझें ॥१४॥ राज्यलोभ राघवासी । नाहीं सर्वथा मानसीं । निश्चयें कळलें आम्हांसी । संदेह ह्यासीं असेना ॥१५॥ परी लळे[6] पाळावे भक्तांचें । हेंचि व्रत श्रीरामाचें । तेथें काय विज्ञापन आमुचें । वृथा करील श्रीराम ॥१६॥

श्रीरामांवरील प्रेमातिरेकामुळे भरतादि सर्वांचा गळा दाटून आला : म्हणोनि घातलें लोटांगण । सुदृढ माथां धरिले चरण । प्रेमें चालिलें स्फुंदन । करी रुदन अट्टहासें ॥१७॥ जेंवी भरताची अवस्था । तैसीच शत्रुघ्नाची तत्वतां । सौमित्र सीता सहित माता । प्रेमावस्था नावरे ॥१८॥ सुग्रीव बिभीषण वानरगण । सुमंत सेनानी प्रधान । अयोध्येचे सकळ जन । प्रेमें स्फुंदन चालविलें ॥१९॥ ऋषिवरांही दशा तैशी । प्रेमें स्फुंदती आवेशीं । तें देखोनि हनुमंतासी । आवेश मानसीं पैं आला ॥१२०॥

---

शब्दार्थ - १. सत्वगुणाने पूर्ण, २. ठरलेली, ३. घातला, ४. शून्य, ५. हौस, ६. लाड, कोड.

भरताची इच्छा पूर्ण करावी असे त्या वेळी मारुतीचे स्पष्ट सांगणे : करोनियां साष्टांग नमन । मृदुमंजुळ मधुर वचन । विनविला श्रीरघुनंदन । भरत वचन मानावें ॥२१॥ तुजलागीं आर्तभूत[1] । तुझीं व्रतें जीं समस्त । असोनि राज्यभोगाआंत । स्वयें भरत आचरला ॥२२॥ तुम्ही असतां वनांतरीं । सहज भोग केले दुरी । भोगीं असोनि अलिप्त परी । ख्याति थोरी भरताची ॥२३॥ तुजलागीं आर्तभूत । भोग भोगोनि त्यजी समस्त । झाला वनवासी व्रतस्थ । वल्कलयुक्त जटाधारी ॥२४॥ आहार सांडोनि निःशेख । श्रीराम भेटावया देख । फळभोजनीं अति हरिख । ऋषि सकळिक समवेत ॥२५॥ त्रिकाळ पादुका पूजितां । क्षण अवकाश नाहीं भरता । श्रीरामकीर्ती वाखाणितां । नाहीं तत्वतां अवकाश ॥२६॥ श्रवण कीर्तन पूजन । सत्संगती कथा गहन । अखंड श्रीरामाचें ध्यान । समाधान तेणें त्यासी ॥२७॥

"भरताला आपण काहीच उत्तर देत नाही हे योग्य नाही : ऐसी असोनि अवस्था । लोटांगणीं विनवितां । उत्तर न देसी रघुनाथा । हें सर्वथा अनुचित ॥२८॥ राज्यलोभ पैं भरतासी । सर्वथा नाहीं मानसीं । कळलें निश्चयें आम्हांसी । प्रमाणासी तुझे चरण ॥२९॥ ऐकोनि मारुतीचें वचन । संतोषला रघुनंदन । भरत उठोनिया जाण । हृदयीं पूर्ण आलिंगिला ॥१३०॥

आपली आज्ञा नाही म्हणून रामांनी मौन धरले हे जाणून वसिष्ठांची रामांना राज्य स्वीकारण्याची आज्ञा : हृदयीं आलिंगोनि पूर्ण । काहीं नेदी प्रतिवचन । सद्गुरूसी कळले चिन्ह । माझें वचन पाहतसे ॥३१॥ श्रीराम मर्यादेचा मेरू । राम भावार्थसागरू । राम आज्ञेचा किंकरू । पूर्णावतारू श्रीराम ॥३२॥ राम गुणांचें मंडन । राम प्रेमाचें जीवन । गुरूचा निजगुरु आपण । देतो मान गुरुत्वा ॥३३॥ गुरुमर्यादा पाळितां । विजय आला रघुनाथा । उत्तरोत्तर होती कथा । स्वधर्मता स्थापिली ॥३४॥ जें जें आचरती श्रेष्ठ । आबाळां[2] तोचि पडे पाठ । राम अवतार श्रेष्ठ । पुराणपाठ श्रीराम ॥३५॥ पितृज्ञाप्रतिपाळण । तुझें वनवासा गमन । चौदा वर्षे नियत पूर्ण । राज्यशासन तेंचि भरता ॥३६॥ होता दोघांचा जो नेम । सिद्धि पावला सर्वोत्तम । आज्ञा पाळावी निःसीम । भरत सप्रेम सुखावीं ॥३७॥ अंगीकारोनि राज्यासी । ब्राह्मणदास्यें अहर्निशी । सुख द्यावें गोविप्रांसी । स्वधर्मासी संरक्षीं ॥३८॥ संरक्षावे गोब्राह्मण । पितृवत् प्रजापाळण । धरा आनंदवावी पूर्ण । स्वधर्मेकरोन श्रीरामा ॥३९॥ अश्वमेधादि महा यज्ञ । तेणें गौरवीं अमरगण । वसुधारा दंडायमान । हव्यवाट[3] जाण सुखी करीं ॥१४०॥ ऐसें वसिष्ठआज्ञापन । हनुमंताचा संदेश[4] पूर्ण । भरताचें प्रेम गहन । तेणें रघुनंदन सुखमय ॥४१॥

श्रीसद्गुरूंची आज्ञा श्रीरामांना शिरोधार्य : सद्गुरूचें आज्ञापन । माथां वंदोनि आपण । बोलता झाला रघुनंदन । आज्ञा कोण उल्लंघी ॥४२॥ ऐकोनि श्रीरामवचन । भरत झाला सुखैकघन । अंगद गर्जिन्नला पूर्ण । रघुनंदननिजराज्य ॥४३॥ अयोध्येचे सकळ जन । आणि सकळ वानरगण । शरणागत बिभीषण । करित गर्जन उठिले ॥४४॥ एका जनार्दना शरण । श्रीरामाचें राज्याभिषिंचन । श्रोतीं द्यावें अवधान । निजनिरूपण राम वदवी ॥१४५॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां । श्रीरामभिषिंचननिर्णयो नाम द्व्यशीतितमोऽध्यायः ॥८२॥ ओंव्या ॥१४५॥ श्लोक ॥७॥ एवं ॥१५२॥

---

शब्दार्थ - १. उत्कंठित, २. लहानांपासून मोठ्यांपर्यंत, ३. अग्नी, ४. निरोप.

# अध्याय त्र्याऐंशींवा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## श्रीरामांना राज्याभिषेक

धन्य तो वाल्मीकिमुनिजन । धन्य धन्य त्याचें वचन । अनागत रामायण । केलें निरूपण शतकोटी ॥१॥ धन्य तें अयोध्याभुवन । धन्य धन्य तेथींचे जन । धन्य तयांचे नयन । नित्य रघुनंदन देखती ॥२॥ धन्य भाग्य त्या भरताचें । नित्य चिंतन श्रीरामाचें । प्रेम देखोनि निष्कर्षाचें । झालें स्वामीचें आगमन ॥३॥

रामराज्याभिषेकासाठी आलेल्यांची नामावली : त्याच्या राज्याचा उत्साहो । अभिषेकी कळवळलाहो । भरतें मांडिला पहा हो । ऋषिसमुदावो मेळवोनी ॥४॥ श्रीरामराज्या-भिषिंचन । पाहूं आले सुरगण । मरुद्गणेंसी पाकशासन[१] । स्वयें आपण तेथें आला ॥५॥ देवगुरु बृहस्पती । तेथे आला शीघ्रगतीं । सनकादिक मुनिपंक्ती । उडी अवचितीं तेथें आली ॥६॥ शुक वामदेव नारद । दत्तात्रेयादि महासिद्ध । ध्रुव उपमन्यु प्रल्हाद । भक्तवृंद पातले ॥७॥ तुंबुरादिक गंधर्व । तेथें पातले स्वयमेव । अष्टनायिका घेवोनि धांव । नृत्यगौरव मांडिलें ॥८॥ नित्य लोकपाळ समुदायेंसीं । भेटों आले उपायनेंसीं[२] । यत्र गंधर्व चारणेंसीं । थाट अयोध्येसीं दाटले ॥९॥ अष्टमहासिद्धींसमवेत । सुस्वर सामवेद गर्जत । घेवोनि ब्रह्मा आला तेथ । श्रीरघुनाथ पहावया ॥१०॥ निजध्येय श्रीरघुनंदन । ऐकोनि त्याचें अभिषिंचन । गणसमुदायेंसीं धांवोन । त्रिनयन तेथें आला ॥११॥ सांडोनियां शेषशयन । विचित्र रत्नें बळिदान । घेवोनि आला जनार्दन । श्रीरघुनंदनदर्शना ॥१२॥ जलचर स्थळचर खेचर । दानव मानव वनचर । त्रैलोक्यांतील चराचर । पाहूं रघुवीर पातले ॥१३॥ श्रीराम तीर्थां तीर्थपीठ । त्यासी होतां राज्यपट । पाहूं आले तर्थींचा थाट । त्यांहीं शरयूतट बसविलें ॥१४॥ वक्री अतिचार[३] होवोनि[३] पूर्ण । सत्वर पातले ग्रहगण । श्रीरामराज्याभिषिंचन । पहावया जाण आनंदें ॥१५॥ रावणाच्या पायांतळीं । होते लोळत मंचकाजवळी । रामें सोडविले तत्काळीं । त्याची राज्यशैली पाहो आले ॥१६॥

अयोध्येतील उत्साह : अयोध्येच्या चौपासीं । विमानें दाटलीं आकाशीं । नगरीं ठाव नाहीं वस्तीसी । थाटें ऐसीं दाटलीं ॥१७॥ मंदार कल्पतरु संतान । घरोघरीं त्यांचेनिं वन । सुरवर सुमनसिंचन । बिदोबिदीं[४] जाण घालिती ॥१८॥ घरोघरीं मंगलार्चनें । दीपावळी नीरांजनें । गुढिया मखरें तोरणें । श्रीरघुनंदननिजोत्सवा ॥१९॥ हाट[५] हटवटिया[५] चौबारें[६] । कथाकीर्तन चौफेरें । गात रामकीर्तन गजरें । अंबर झरे तुषारीं ॥२०॥ वसिल्या भक्तीच्या पेठा । आनंदकीर्तन चौहटां । सांदीबिदीं राजवाटा । सुकाळ मोठा नामाचा ॥२१॥ शेट महाजन वेव्हारे[७] । श्रीरामागमनसुखीरें । उदीम करिती अत्यादरें । लाभ निर्धारें श्रीराम ॥२२॥ राम टके खरें नाणें । एकी मोहरा देणें घेणें । अक्षर[८] रसाचें त्याचें निजकेणें[९] । सवदा करणें निजसत्ता ॥२३॥ द्वैत दलालाची ओढी । नाहीं मापारियाची सांकडी । आपुलाल्या निजवडीं । द्यावया गाडी निजवस्तु ॥२४॥ राममुद्रावस्तूवरी । आंख घालोनि साटीकरीं[१०] । देतां घेतां सुखचि वरी । उदीम भारी चालत ॥२५॥

भरत वसिष्ठांकडे अभिषेक-सामग्रीची विचारणा करतो : येरीकडे वीर भरत । श्रीरामप्रेमें

---

शब्दार्थ - १. इंद्र, २. नजराणे घेऊन, ३. मार्ग सोडून, ४. रस्तोरस्ती, ५. बाजार, ६. चवाठे, ७. व्यवहारी लोक, ८. अविनाशी, ९. आपला माल, १०. साटे ठरवून.

अत्यद्‌भुत । सद्‌गुरूसी शरणागत । होवोनि पुसत सामग्री ॥२७॥ श्रीरामाभिषेकसामग्री । स्वामी सांगावी झडकरी । कोण पदार्थ कैसिये परी । निजनिर्धारीं आज्ञापीं ॥२७॥ देखोनि भरताच्या प्रेमासी । अत्यंत सुख वसिष्ठासी । प्रीतीं धरोनि पोटेंसीं । निजहृदयेंसीं आलिंगिला ॥२८॥

वसिष्ठकृत भरतप्रशंसा : भरता तुझें भाग्य गहन । भरता तुझी भक्ति धन्य । भरता तुझें प्रेम धन्य । भाव धन्य तुझा भरता ॥२९॥ श्रीरामाचें भजनसुख । तुवांचि सेविलें सम्यक[1] । भजनमर्यादा अति नेटक। आचार्यत्वें देख प्रकाशिली ॥३०॥ भरत भक्तीचें भांडार । भरत भक्तीचें निजसार । भरत भक्तीचें माहेर । भरतें उद्धार भक्तीचा ॥३१॥ म्हणोनि दिधलें आलिंगन । प्रीतीकरोनि मुखचुंबन । शास्त्रविधी निजलक्षण । सामग्री पूर्ण अभिषेका ॥३२॥ सर्वज्ञ ज्ञाता तूं होसी । विधिपाळण करूं आलासी । तरी पूर्वीच रामसिद्धीसी । तुझपासीं उपदेशिलें ॥३३॥

मानसोपचारच प्रत्यक्ष रूपाने आणवून अभिषेक करावा अशी श्रीवसिष्ठांची भरताला आज्ञा : तेणें अनुक्रमें जाण । तुवां करितां आराधन । अंतर्योग सुलक्षण । जेणें रघुनंदन भेटला ॥३४॥ जे केले मानसोपचार । तेचि प्रत्यक्ष साचार । मेळवोनि वेगवत्तर । श्रीरघुवीर अभिषेकीं ॥३५॥ लाहोनि[2] सद्‌गुरूआज्ञापन । करोनि साष्टांगी नमन । जेथें सुग्रीव बिभीषण । तेथें ठाकून पैं आला ॥३६॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा भरतः सत्यविक्रमः । पाणौ जग्राह सुग्रीवं प्रविवेश ततो गृहम् ॥१॥

भरत सुग्रीव-बिभीषणाच्या भवनाला आला : श्रीरामाचे निजगण । सुग्रीवादि बिभीषण । श्रीरामभवनासमान । स्थानें नेमून तयां दिधलीं ॥३७॥ ज्यांचिया निजभवनांसी । सत्यकीर्ति सत्वराशी । भरत रामाभिषेकासी । पुसों विचारासी तेथें आला ॥३८॥ धरोनि सुग्रीवाचा हात । प्रवेशला भवनाआंत । एकासनीं आसनस्थ । निजवृत्तांत सांगत ॥३९॥ पित्राज्ञा अति दुस्तर । पाळावया रघुवीर । व्रतें धरिलीं दुर्धर । जीं दुस्तर सुरसिद्धां ॥४०॥ धरितां न धरवती मानसीं । ऐकतां चळकांप चित्तासी । तीं आचरला वनवासीं । झालीं जगासी सुखकारी ॥४१॥ निवटोनियां रक्षोगण । मुक्त केलें जनस्थान । दुष्ट निवटोनि रावण । सुरगण सोडविले ॥४२॥ कर्म आचरोनि अदभुत । संपादिला सुरकार्यार्थ । वनीं श्रमला रघुनाथ । व्रत समाप्त पैं करावें ॥४३॥

श्रीरामराज्याभिषेकाची सर्व जबाबदारी आपण स्वीकारावी अशी भरताची त्या दोघांना प्रार्थना : तुम्ही प्रियकर रामाचें । तुमचें वचन मानीं साचें । सुमुहूर्तअभिषेकाचें । तुम्ही साचें संपादा ॥४४॥ म्हणोनि धरिले दोनी चरण । येरू घाली लोटांगण । आम्ही तुझें किंकर जाण । आज्ञापन करीं आम्हां ॥४५॥ सुग्रीवादि बिभीषण । अंगदादि मारुति जाण । भरतें नमिलें वानरगण। मृदु वचनें विनवोनी ॥४६॥ सुग्रीवासी अति प्रीतीं । भरत करीतसे विनंती। अभिषेकावया रघुपती । आज्ञा दूतीं करावी ॥४७॥

अभिषेकाय रामस्य दूतनाज्ञापयत्स्वयम् । तच्छुत्वा वानरेन्द्रश्च सौवर्णांश्चतुरो घटान् ॥२॥
चतुर्णां कपिमुख्यानां ददौ रत्नविभूषितान् ॥३॥

उदईक सकाळी अभिषेकासाठी चारी दिशांचे उदक आणण्यास सुग्रीवाला भरताने सांगितले : श्रीराम अभिषेकावया सांग । प्रभाते मुहूर्त अति अव्यंग । गुरुपुष्य अमृतसिद्धियोग । पाहिजे अति वेग पैं केला ॥४८॥ इतर पदार्थां नाहीं अटक । पाहिजे चतुःसमुद्रींचें उदक । तें तुम्हीं

शब्दार्थ - १. बरोबर, २. मिळवून.

आवश्यक । पाहिजे सम्यक आणिलें ॥४९॥ ऐकोनि भरतवचन । जोडल्या करीं वानरगण । सुग्रीवासी विनवण । करोनि जाण पूसत ॥५०॥ कोणे दिशेप्रती कोण । जाणें नेमूनि आपण । शीघ्र द्यावें आज्ञापन । आणावया पूर्ण समुद्रजळ ॥५१॥ ऐकोनि जुत्पत्तींचें वचन । सुग्रीव झाला सुखैकघन । दिशा नेमूनि संपूर्ण । केलें आज्ञापन सेवकां ॥५२॥ हेमकुंभ[१] रत्नाभरणी[२] । भरतें आणिलें तत्क्षणीं । सुग्रीवें अति प्रीतीकरोनि । दिधले वांटूनी जुत्पती ॥५३॥

उत्तरेला हनुमंत, दक्षिणेला ऋषभ, पश्चिमेला नळ व पूर्वेला अंगद याप्रमाणे सुग्रीवाने उदक आणण्यास पाठविले : उत्तर दिशा अतिदुरंत[३] । हनुमान पाठविला तेथ । दक्षिणे ऋषभ विख्यात । कुंभेंसहित निघाला ॥५४॥ नळ पश्चिम समुद्रासी । वेगें निघाला हेमकुंभेंसीं । अति उल्लासें निश्चयेसीं । पूर्वे अंगदासी नेमिलें ॥५५॥ युवराजा अति पवित्र । अति बळियाढा अंगद वीर । लक्षून गेला पूर्वसमुद्र । वेगवत्तर हेमकुंभें ॥५६॥ चहूं दिशां चौघे जण । अति बळियाढे वानरगण । वेगें करोनि उड्डाण । क्षणें गगन आक्रमिलें ॥५७॥ वेगें जावोनि सिंधुपासीं । रत्नजडित हेमकुंभेंसीं । शुद्ध प्रक्षाळून वेगेंसीं । समुद्रोदकासी भरियेलें ॥५८॥

त्या चौघा वीरांनी सूर्योदयापूर्वीच हेमकुंभ भरून सागरतीर्थ आणले, त्यामुळे वसिष्ठादिकांना अपार आनंद : सूर्योदय न होता पूर्ण । घेवोनि आले समुद्रजीवन । वसिष्ठापुढें ठेवोनि जाण । लोटांगण घातलें ॥५९॥ देखोनि वानरांचा प्रताप । उड्डाण किराण साटोप । वसिष्ठ सुखावला अमूप । प्रीतिपूर्वक आलिंगी ॥६०॥ श्रीरामभजनपरिपाटीं[४] । वानरांची नित्य पुष्टितुष्टी । अहंसोहं सुटल्या गांठी । सद्गुरुभेटी निश्चितीं ॥६१॥ देखोनियां समुद्र जीवन । सुग्रीव आणि बिभीषण । सुख उथळलें गहन । श्रीरघुनंदनअभिषेका ॥६२॥ भरत येवोनि आपण । धरिले वसिष्ठाचें चरण । स्वामींनी केलें आज्ञापन । श्रीरघुनंदनअभिषेका ॥६३॥

भरताने वसिष्ठांना त्यांच्या पवित्र हस्ते रामांना अभिषेक करण्याचे विनविले : तरी श्रीरामाभिषिंचन । करावया मी मशक कोण । स्वामींनी निजहस्तेंकरोन । अभिषिंचन करावें ॥६४॥ सद्गुरुहस्तें अभिषेक होतां । अक्षय राज्य रघुनाथा । आम्हां सकळां अति श्लाध्यता[५] । जाण तत्वतां स्वामिया ॥६५॥ आणि श्रीरामाचें मनोज्ञ[६]। ऐसेंचिं आहे जाण । जें गुरुहस्तें अभिषिंचन । तें अक्षय पूर्ण स्वामिया ॥६६॥ यालागीं तुम्हीं निजहस्तें । अभिषेकावें श्रीरामातें । ऐकोनि भरतवचनातें । वसिष्ठ चित्तें सुखावला ॥६७॥

अभिषेकाय रामस्य शत्रुघ्नः सचिवैर्वृतः । पुरोहिताय श्रेष्ठाय वसिष्ठाय न्यवेदयत् ॥४॥
शास्त्रदृष्टेन विधिना महाद्भिर्विदितेन च ॥५॥

सर्वांच्या विनंतीने वसिष्ठांना संतोष : भरत आणि शत्रुघ्न । सुग्रीवादि बिभीषण । सकळीं वसिष्ठ प्रार्थून । केला प्रसन्न अभिषेका ॥६८॥ सुमंत आणि हनुमान वीर । सकळ प्रधानांचा भार । रत्नकुंभ जल सागर । अति सत्वर निवेदिलें ॥६९॥ देखोनि समुद्रजीवन । वरी भरताचें आज्ञापन । तेणें वसिष्ठ सुखायमान । केलें नमन ऋषिवरां ॥७०॥

श्रीरामांच्या अभिषेकाला सर्वांची उपस्थिती. त्यांची नावे : सकळ भूमंडळींचे ऋषीश्वर । सनकादि सिद्ध समग्र । नारदादि भक्तवर । सकळ रघुवीरअभिषेका ॥७१॥ ब्रह्मा जो कां निजपिता । तोही बोलाविला तत्वतां । अभिषेकावया रघुनाथा । आला धाता[७] लोकपाळांसीं ॥७२॥ यक्ष गंधर्व चारण । निगणेंसीं त्रिनयन । सिद्ध पातले धांवोन । श्रीरघुनंदनअभिषेका ॥७३॥

शब्दार्थ - १. सुवर्णाच्या घागरी, २. रत्नखचित, ३. अत्यंत दूर, ४. श्रीरामभजनाच्या क्रमामुळे, ५. भूषण, ६. अभिप्राय, ७. ब्रह्मदेव.

जलचर स्थळचर । दानव मानव पाताळचर । अयोध्ये दाटले समग्र । पहावया रघुवीरअभिषेका ॥७४॥ नभ दाटलें विमानीं । पृथ्वी दाटली नृपयानीं । तेणें सुखावली अवनी । रामाभिषिंचनीं आनंद ॥७५॥ वसिष्ठ सद्गुरु धर्मज्ञ । केलें सकळां विज्ञापन । तुम्हीं निज वैभवेंकरून । रघुनंदन अभिषेका ॥७६॥ मंडळवर्ती आले भूपाळ । त्यांसी आज्ञापिलें तत्काळ । उपायनें आणा सकळ । रघुकुळपाळअभिषेका ॥७७॥ त्रैलोक्यविजयी रघुपती । आला ऐकोनि अयोध्येप्रती । राजे पातले भूपती । अभिषेकार्थी सत्वर ॥७८॥ पूर्वपश्चिमनृपती । उत्तरेचे नेणों किती । दक्षिणदिशेचे भूपती । आले गडपती गडपाळ ॥७९॥ पर्वतवासी जे भूपती । म्लेंच्छ राजे नेणों किती । गौडबंगाल असंख्यस्थिती । आले रघुपतिअभिषेका ॥८०॥

सर्वांनी आपापल्या योग्यतेनुरूप रामांची पूजा करावी अशी वसिष्ठांची आज्ञा : जितुकें जयाचें सामर्थ्य । तितुकेनिसीं रघुनाथ । स्वयें पूजावा यथोचित । वसिष्ठें तेथ आज्ञापिलें ॥८१॥ ऐकतां वसिष्ठवचन । अवघे झाले सुखैकघन । यथासामर्थ्ये करोनि जाण । पूजाविधान मांडिले ॥८२॥

पूर्वदिवशी उपोषण करून रामांनी त्या दिवशी मंगलस्नान केल्यावर वसिष्ठांकडून रामांना अभिषेक : मुक्त करोनि जटाबंधन । सौमित्रजानकींसहित जाण । श्रीरामें करोनि मंगलस्नान । उपोषण पूर्वदिवसीं ॥८३॥ श्रीरामा सहजचि उपोषण । चौदा वर्षे व्रत गहन । राज्याभिषेकीं विधिपाळण । फळभोजन न करीचि ॥८४॥ प्रभातीं गुरुपुष्यकरीं । वसिष्ठ रामासी अभिषेक करी । परिसा तेथींची नवलपरी । संक्षेपाकारीं सांगेन ॥८५॥ श्रीरामाचें अभिषिंचन । सकळ आकळूं शके कोण । वक्ता एक जनार्दन । निजनिरूपण चालवित ॥८६॥

अभिषेकसोहळ्याचे रामच वर्णन करवितात : तेथें संकोच साकल्यता । सुचूं परिहार[1] केउता । स्वयें श्रीराम वदनीं वक्ता । कर्ता करविता तोचि तो ॥८७॥ श्रीराम आणि जनार्दन । स्वरूप एक नामें भिन्न । जना सबाह्य असोनि पूर्ण । करवी चळण इंद्रियांचें ॥८८॥ जनार्दन वदतां वदनीं । अर्थमय शब्दश्रेणी । उघडित प्रेमाची खाणी । निजात्मगुणीं विनवोनी ॥८९॥ नयनीं देखता जनार्दन । जनार्दन वदवी वचन । रसने रसज्ञ आपण । घ्राणीं अवघ्राण सुवास तो ॥९०॥ त्वगिंद्रियस्पर्शनानंद[2] । तो जनार्दनें केला बोध । बुद्धीचा निश्चयो शुद्ध । अति विशुद्ध जनार्दनें ॥९१॥ चेतवोनि अहंकार । दाटोवाटी[3] निजचरित्र । चालवित अति सत्वर । इतर व्यापार सांडोनी ॥९२॥ असो परिहाराचा अतिशयो । कर्ता करविता रामरावो । तेथें कायसा संदेहो । निजनिर्वाहों श्रीरामें ॥९३॥ अभिषेक श्रीरघुनाथा । सर्वज्ञ वसिष्ठ स्वयें कर्ता । अवधान द्यावें श्रोतां । साधकां तत्वतां उपयोगी ॥९४॥

श्रीरामांच्या सर्व उपचारांचे आध्यात्मिक रूपकात्मक वर्णन : सर्वदा पूर्णमनोरथ । तोचि औदुंबर सदाफळित । भद्रपीठ अति मंडित । तेज अद्भुत झळके कीं ॥९५॥ दुजें पीठ देदीप्यमान । सूर्यमंडळासमान पूर्ण । द्वादशकळामंडित जाण । श्रीरघुनंदनअभिषेका ॥९६॥ त्यावरी पीठ तिजें । षोडशोपचारीं विराजे । चंद्र देखोनि त्यातें लाजे । दडी मारिजे आसनातळीं ॥९७॥ एवं सूर्य अग्नि चंद्रमा । आसनातळीं दाटती रामा । त्या श्रीरामाचा महिमा । वाग्धर्मा अनिर्वाच्य[4] ॥९८॥ क्रोधव्याघ्राचें शोधून अंतर । क्रूरचारट सांडोनि दूर । शांतिचर्म अति परिपर । श्रीरघुवीरवरासना ॥९९॥ हेमकुंभ शतानुशत । दीर्घ वोसंडे वृषभ श्वेत । सुवर्णभृंगार[5] क्षीरयुक्त । अति मंडित अभिषेका ॥१००॥ अनिर्वाच्य त्याचें महिमान ।

---

शब्दार्थ - १. त्याग, २. इंद्रियस्पर्शसुख, ३. बळेबळेच, ४. वाणीने वर्णन करण्यास कठिण, ५. सोन्याची झारी.

जिहीं रामाभिषेकीं क्षीर जीवन। हृदयीं धरिलें सावधान। भाग्य गहन तयांचें ॥१॥ वस्त्रें सपुर[1] विरंजांबरें[2]। अत्यंत भावार्थ परिकरें। वेढावया श्रीरघुवीरें। आणिली पवित्रें पूजेसीं ॥२॥ प्रेमजळें पूर्ण परम। सिंधुसंगम शुद्धसंगम। गंगायमुना त्रिवेणीसंगम। आणिलीं परम पवित्रजळें ॥३॥ सप्तधातू ते शोधित देखा। आणिले सप्त कुश सप्त मृत्तिका। सप्त ऋषी आणिले ऐका। रघुकुळटिळकअभिषेकीं ॥४॥ संकल्पविकल्पातीत। चैतन्य प्रभवे वेगयुक्त। मनोवेगातें जिणोनि जात। तैसा वारुवीं रथ जुंपिला ॥५॥ असंभावना विपरीत ज्ञान। हेचि मत्त पंचानन। त्यातें विदारिते शार्दूल[3] गहन। रथीं जुंपोन आणिले ॥६॥ शुद्धसत्वें अति मंडित। चंद्रोपम छत्र श्वेत। श्वेत चामरें रत्नदंडयुक्त। सुवासित भक्तिव्यजनें ॥७॥ रामाभिषेकीं मंगल पूर्ण। शांतिगौचें गोरोचन। नामें हरिद्रा सुरंगपूर्ण। सौभाग्यमंडन सर्वदा ॥८॥ भक्तिप्रेमें लवलव। क्षीरपल्लव पद्मपल्लव। तोरणें बांधिलीं अपूर्व। श्रीरघुरावअभिषेका ॥९॥ दधिमधुघृताक्षतायुक्त। पूर्णकलशेंसीं साळंकृत। अष्टौ कन्या पैं दानार्थ। उभ्या तिष्ठत अभिषेका ॥११०॥ मुकुट कुंडलें कटिमेखळा। बाहुअंगदें सुमनमाळा। सिद्ध सामग्रिया सकळां। ब्राह्मणमेळा तिष्ठत ॥११॥

> ततः पुरोहितो वृद्धो वसिष्ठो ब्राह्मणैः सह। रामं रत्नमये पीठे ससितं संन्यवेशयत् ॥६॥
> वसिष्ठो वामदेवश्च जाबालिरथ काश्यपः। कात्यायनो भरद्वाजो विजयः सहगौतमः ॥७॥
> अभ्यर्षिचन्नरव्याघ्रं प्रसन्नेन सुगंधिना। सलिलेन सहस्राक्षं वसवो वासवं यथा ॥८॥

अभिषेकासाठी वसिष्ठ, वामदेव, जावाली इत्यादी ब्रह्मर्षींची हजेरी : षड्गुणेश्वर्यसंपन्न। वृद्ध कुळगुरु सनातन। श्रीवसिष्ठ ज्ञानघन। श्रीरघुनंदनअभिषेका ॥१२॥ आणिकही विख्यात ऋषिजन। ब्रह्मादि देवां नित्य मान्य। ज्यांचेनि नामें पापमोचन। जे भवतारण प्रतापें ॥१३॥ ऐका त्यांचे अभिधान। वामदेव जाबालि कश्यप जाण। कात्यायन भरद्वाज गहन। नामें पावन महीतळीं ॥१४॥ आणीकही ऋषि बहुत। जे पृथ्वीचें स्तंभ मूर्त। अभिषेकावया श्रीरघुनाथ। आले शीघ्रवत समकाळें[4] ॥१५॥

> अयोध्यानगरे रम्ये रत्नमंडपमध्यगे। स्मृता कल्पतरोर्मूले रत्नसिंहासने शुभम् ॥९॥
> तन्मध्येऽष्टदलं पद्म नानारत्नप्रवेष्टितम्। तत्र रामं च ऋषयो ध्यायंतेऽजं परात्परम् ॥१०॥

वेदमंत्रांच्या मंगल घोषांत सर्व ऋषींनी रामजानकीला अभिषेक केला : ऐसें ऋषिवरीं सकळिकीं। श्रीरामासहित जानकी। रत्नमंडपीं बैसवोनि निकी। अभिषेकीं सुमुहूर्त ॥१६॥ पुण्यपूज्य ऋषीश्वर। करिती वेदघोषउच्चार। दीर्घस्वरें मंत्रोच्चार। श्रीरघुवीरअभिषेकीं ॥१७॥ सुमंगलें सुवासित। पुण्यजळें अति विख्यात। आणिलीं होतीं पुण्योचित। तिहीं रघुनाथ अभिषेकिला ॥१८॥ श्रुतिस्वरांचे उच्चार। पुराणोक्त मंत्र अपार। जयजयकारें अंबर। गर्जे सत्वर रामनामें ॥१९॥ सकळ सुरवर स्वर्गस्थ। देवगुरुसमवेत। जेंवीं इंद्रातें अभिषोकित। तेंवी रघुनाथ अभिषेकिला ॥१२०॥ ज्यासी जेथे जेथें अधिकार। तेणेंकरोनि रघुवीर। अभिषेकिला अति सत्वर। निजउद्धार व्हावया ॥२१॥ पदाभिमानें संतप्त। हर्षविषादीं दुःखित। तेथोनि व्हावया निर्मुक्त। आर्तें[5] रघुनाथ अभिषेकिती ॥२२॥ तया अभिषेकाचें लक्षण। यथामति निवेदीन। साधु श्रोतें स्वामी सर्वज्ञ। द्यावें अवधान कूर्मावलोकनें[6] ॥२३॥

---

शब्दार्थ – १. भरपूर, २. बिनमोल स्वच्छ वस्त्रे, ३. शंभर, ४. एकेच वेळी, ५. अत्यंत उत्सुकतेने, ६. कृपायुक्त.

ऋत्विग्भिर्ब्राह्मणैः सार्धं कन्याभिर्मन्त्रिभिस्तदा । बलमुख्यैश्च संहृष्टैः सोऽभिषिक्तश्च नैगमैः ॥११॥
सर्वौषधिरसैश्चैव दैवतैर्नभसि स्थितैः । चतुर्भिर्लोकपालैश्च समेतैः सर्वदैवतैः ॥१२॥

कोणी कोणी श्रीरामांना कसा कसा अभिषेक केला : नित्यानित्यविवंचन । तेणें वेद श्रमला पूर्ण । देखोनयां रघुनंदन । केलें अभिषिंचन नेतिशब्दें ॥२४॥ ऋत्विज जे कां अभिषेकार्थी । कर्मकलापक्रियायुक्ती । देखोनियां श्रीराममूर्ती । निष्कर्मस्थितीं अभिषेक ॥२५॥ अष्टनायिका सौंदर्यबल । तिहीं देखोनि रघुकुळपाळ । निजावयवीं विटोनि सकळ । लाजिल्या प्रबळ अभिषेकीं ॥२६॥ मंत्री प्रधान सेनानी । सामर्थ्यें बुद्धिबळेंकरोनी । तेही श्रीरामातें देखोनी । अभिशिंचनीं लाजिले ॥२७॥ वनस्पतींचा राजा सोम[1] । ओषधिरस सर्वोत्तम । अभिषिंचिता रघूत्तम । सुरसोत्तम ओषधीं ॥२८॥ चतुर्दिशांचे दिक्पाळ । देवगंधर्वादि सकळ । स्वर्ग मृत्यु आणि पाताळ । श्रीराम तत्काळ अभिषेकिती ॥२९॥ अमर अमृत सेविती । परी मरणार्णवा[2] न चुकविती । अमृताभिषेकीं रघुपती । अमृतप्राप्ती अमरांसी ॥१३०॥ मानवीं सिंचन प्रेमामृतें । पन्नगीं सिंचन परामृतें । गंधर्वीं श्रीरामातें । नादामृतें अभिषेकिलें ॥३१॥ हरिदासीं नामामृतें । अट्टाहास्यें आनंदयुक्तें । अभिषेकिलें श्रीरामातें । केलें त्रैलोक्यातें पावन ॥३२॥ अयोध्येच्या जनीं समस्तें । चित्तें वित्तें जीवितें । अभिषेकिलें श्रीरामातें । उल्लासितें निजमनें ॥३३॥ भरतें अभिषेकिलें भावार्थें । श्रीराममाता पुत्रस्नेहार्थें । सौमित्र शत्रुघ्नें हर्षें तेथें । केला स्वामीतें अभिषेक ॥३४॥ स्थावर जंगम चराचर । जीवमात्र लहान थोर । त्यांहीं राजा श्रीरामचंद्र । सर्वस्वें साचार अभिषिंचिला ॥३५॥

छत्रं तस्य तु जग्राह शत्रुघ्नः पांडुरं महत् । श्वेतं च वालव्यजनं सुग्रीवो वानरेश्वरः ॥१३॥
अपरं चंद्रसंकाशं वालव्यजनमुत्तमम् । हृष्टो रामस्य जग्राह राक्षसेंद्रो बिभीषणः ॥१४॥
मालां ज्वलंतीं वपुषा कांचनीं शतपुष्कराम् । राघवाय ददौ वायुर्वासवेन प्रचोदितः ॥१५॥
रत्नाध्यक्षः समुद्रस्तु मणिरत्नपरिष्कृतम् । मुक्ताहारं समादाय प्रादाच्छक्रप्रचोदितः ॥१६॥

अभिषेक समारंभात प्रत्येकाने केलेली सेवा : भावार्थाचें वास[3] परिकर । पीतांबर अति मनोहर । भरतें आणोनि सत्वर । श्रीरामचंद्र पूजिला ॥३६॥ सद्गुरू वसिष्ठें आपण । चिद्रत्नाचें[4] जडित भूषण । शीघ्र आणोनियां जाण । श्रीरघुनंदन अलंकारिला ॥३७॥ छत्र शुद्ध श्वेतांबर[5] । चंद्रप्रभासम परिकर । श्रीरामावरी प्रीतिपुरःसर । शत्रुघ्नें सत्वर धरियेलें ॥३८॥ कनकदंडें रत्नाकारें । शुभ्र व्यंजनें[6] परिकरें । दोघां जणीं युग्मचामरें । अति सत्वरें धरियेलीं ॥३९॥ सुग्रीव आणि बिभीषण । चामरधारी दोघे जण । स्वयें होवोनि आपण । श्रीरघुनंदन वीजिती[7] ॥१४०॥ इंद्रा अति गौरव । तेणें अमरावतीचें वैभव । आणोनि पूजिला राघव । सुखें स्वयमेव बंदिमोचनें ॥४१॥ देखोनि इंद्राची पूजनकळा । आनंद सकळां लोकपाळां । वायूनें येवोनि तत्काळा । घनसांवळा पूजिला ॥४२॥ कांचनयुक्त रत्नमाळा । विचित्रगुणी विचित्रकळा । आणोनियां तत्काळा । घनसावळा पूजिला ॥४३॥ जावोनि शेषशयनींहूनी । रामें निवटिला दशाननी । क्षीरसागरें संतोषोनी । भेटी रामालागोनी आणिली ॥४४॥ स्वयें रत्नांचा निकर । विचित्र रत्नें परिकर । मुक्तघोषीं मंडित हार । गुंफोनि सत्वर आणिला ॥४५॥ श्रीरामें देखोनियां दृष्टीं । बाणिला जनकात्मजाकंठीं । तेणें शोभली गोरटी । श्रीराम नेहटी[8] अंकस्थ ॥४६॥

---

शब्दार्थ - १. चंद्र, २. मरणरूपी समुद्राला, ३. वस्त्र, ४. चैतन्यरूपी रत्नाचे, ५. शुभ्रवस्त्रयुक्त, ६. पंखे, ७. वारा घालितात, ८. बसवी

प्रकृत्या सीतया सार्धं सूर्यवत्तिग्मतजसम् । चतुर्भुजं शंखचक्रगदापंकजधारिणम् ॥१७॥
किरीटहारकेयूररत्नकुंडलशोभितम् । देवैः सह मुनीन्द्रैश्च योगिवृंदैश्च सेवितम् ॥१८॥

क्षीरसिंधूची दुहिता[1] । जनकात्मजा सती सीता । संतोषावया तिच्या चित्ता । श्रीरामें सीता पूजिली ॥४७॥ इतरही जे जे लोकपाळ । यथासामर्थ्यें अविकळ । पूजिते झाले पैं सकळ । रघुकुळपाळ निजराजा ॥४८॥ यथासामर्थ्यें यथाचित्तें । वित्तें जीवितें भावार्थें । पूजिते झाले श्रीरामातें । उल्लासित मानसीं ॥४९॥ श्रीरामाचा राज्याभिषेक । पाहूं आले तिन्हीं लोक । तिहीं यथासामर्थ्यें देख । रघुकुळटिळक पूजिला ॥१५०॥

सिंहासनारूढ श्रीरामांची निस्सीम तेजस्विता : सिंहासनीं श्रीरामचंद्र । शोभा शोभली विचित्र । लाजोनि रविचंद्र । प्रकाश मनोहर सुखमय ॥५१॥ ते काळींच्या रूपासी । सीमा न करवे शास्त्रांसीं । मौन पडलें उपनिषदांसी । नेति वादेंसी वेद परते ॥५२॥ तया रूपाचें वर्णन । वदावया मी अल्प दीन । कृपाळु एका जनार्दन । निजात्मवर्णन सांगत ॥५३॥ श्रुतीस रिघतां जेथें सांकडें । परेसी सर्वथा नातुडे । तेथें वैखरी सैरां वावडे । हे सामर्थ्य घडे गुरुकृपेसीं ॥५४॥ गुरुकृपेचे निजपक्षें । अलक्ष लक्षेंवीण लक्षे । निर्विकल्पीं सावकाशें । स्वयें प्रकाशे मन बुद्धि ॥५५॥ तो जगद्गुरु जनार्दन । एकाएकीं वोळला पूर्ण । श्रीरामस्वरूपाचें वर्णन । आपल्या आपण सांगत ॥५६॥ त्या श्रीरामाचें स्वरूपवर्णन । श्रोते परिसोत सावधान । एका विनवी जनार्दन । स्वानंदघन श्रीराम ॥१५७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामराज्याभिषेको नाम त्र्यशीतितमोऽध्यायः ॥८३॥ ओंव्या ॥१५७॥ श्लोक ॥१८॥ एवं ॥१७५॥

## अध्याय चौऱ्याऐंशींवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### श्रीरामस्वरूपवर्णन

जयजयाजी श्रीजनार्दना । एकानेका परिपूर्णा । जनीं असोनि अभिन्ना । अलिप्त जगासी ॥१॥ जनीं आहेसी तत्वतां । म्हणोनि तेथें भाव धरितां । ते तुझी माया गा अच्युता । तेथें सर्वथा तूं नससी ॥२॥ जेंवी उदकाचा निखळ[2] फेन । तो फेन पितां नवचे[3] तहान । तेंवी तुजपासून जहाले जन । ते जनां जाणी भेटसी ॥३॥ फेन निरसोनि उदक घेणें । जन निरसोनि तूतें देखणें । सोनटकाहूनि सोनें पहाणें । अन्यथा शिणणें वायांचि ॥४॥ हे अभेददर्शनहातवटी । तूंचि गुरुत्वें कृपादृष्टीं । अवलोकिसी संवसाटीं[4] । तैं दिठी पैठी तुजमाजी ॥५॥ त्या तुझें स्वरूप चिद्घन । नामरूपें अवतारचिन्ह । धरिलें त्याचें निजवर्णन । कर्ता जाण तूं स्वामी ॥६॥ देव साक्षात् नारायण । ऐसा सांगताही वेदचि जाण । तैसें माझेनि वदनें जाण । कर्ता जाण तूंचि तूं ॥७॥ विनटोनि अहंरावण । राज्याभिषेकविराजमान । सिंहासनीं रघुनंदन । शोभायमान निजतेजें ॥८॥ सकळां श्रीरामीं प्रीति गहन । निजाधिकारें देखिला जाण । परिस तयाचें लक्षण । एका जनार्दन वदवित ॥९॥ सनकादिक मुनिवृंद । वसिष्ठादि मुनि प्रसिद्ध । नारदादि महासिद्ध । आत्मत्वें शुद्ध जाणितला ॥१०॥ सृष्टीपूर्वीं जे सनातन । सृष्टिरूपें विराजमान । जेथें सृष्टीसीं लयो जाण । तेंही रघुनंदनस्वरूप ॥११॥ दुःख न रिघे अळुमाळ । जेथें सुखमयचि केवळ । उत्पत्तिस्थितिप्रळयकाळ । जेथें सकळ मृगजळत्वें ॥१२॥ जेथें दृश्य

---

शब्दार्थ – १. कन्या, २. निव्वळ, ३. भागत नाही, ४. कृपेने.

द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता आणि ध्यान । ज्ञेय ज्ञाता निजज्ञान । अभाव पूर्ण त्रिपुटीचा ॥१३॥ जें शुद्ध चैतन्य एकवट । जें अंतर्बाह्य निघोट[1] । आदि मध्य आणि शेवट । न कळे स्पष्ट जयाचा ॥१४॥ तें हें श्रीरामाचें रूपडें । सिद्धीं देखिलें वाडेंकोडें । दृष्टी पाहतां जयाकडे । सुखसुरवाडीं बुडाली ॥१५॥ अवलोकितां रघुनंदन । देखणे झाले नयन । देखणें देखती देखणे होऊन । देखणे नयन श्रीरामीं ॥१६॥ ब्रह्मादि इंद्रप्रमुख । तिहीं विराटमूर्ति अशेख । स्वयें देखिला रघुकुळटिळक । ऐका विवेक तयाचा ॥१७॥ भूलोकादि सप्तपाताळ । ते रामाचे चरण कोमळ । भूवर्लोक जघनयुगुल[2] । सांग सकळ विराजे ॥१८॥ स्वर्लोक तें रामजघन । तेथें विराजे स्वर्गभुवन । महर्लोक नाभिस्थान । जाण संपूर्ण रामाचें ॥१९॥ जनलोक हृदय देख । कंठीं विराजे तपोलोक । श्रीरामाचा मुखमयंक[3] । तेथें सत्यलोक विराजे ॥२०॥ असो किती सांगों भिन्न भिन्न । ॐतत्सत् ऐसें वचन । तें सर्वात्मक रघुनंदन । अनवच्छिन्न[4] एकत्वें ॥२१॥ जेंवी सूत्रीं मणिगण । ओतप्रोत संपूर्ण । तेंवी चराचरीं रघुनंदन । विबुधीं[5] जाण देखिला ॥२२॥ कौसल्यादि माता समस्तीं । जन्मकाळीं चैतन्यमूर्ती । पूर्वी जैसी देखिली होती । त्याच स्थितीं देखिली ॥२३॥ चैतन्यघन अतिलावण्य । पाहोनि मदनमोहन । जानकी झाली लज्जायमान । रघुनंदन देखती ॥२४॥ भरत श्रीरामाचा भक्त । विरक्त आणि अनुरक्त । नित्यानुवर्ती[6] प्रेमयुक्त । कैसा रघुनाथ देखिला तेणें ॥२५॥ भरत देखणा विचक्षण । श्रीरामाचें देखणेपण । सर्वस्वेंसीं आकळून । देखणेन देखणें श्रीराम ॥२६॥ स्वप्रकाशें स्वलीला । दिव्य तेजाचा उमाळा । निजतेजीं अति सोज्ज्वळा । भरतें डोळां देखिला ॥२७॥ तेणें निजतेजें विलासे । मीतूंपणाचा ठाव पुसे । जग आत्मत्वें प्रकाशे । अति उल्लासे निजानंदें ॥२८॥ ज्या तेजानेचि निर्धारें । अहंसोहं समूळ विरे । ब्रह्मत्वें त्रैलोक्या अवतरे । सर्वांगीं भरे स्वानंदकंद ॥२९॥ ज्या तेजाचेनि निजनिष्ठें । विषयांचे विषयत्व आटे । बंधमोक्षांचें बिरडें[7] फिटे । स्वसुखें कोंदाटे आब्रह्म भुवन ॥३०॥ ज्या तेजाचिये दीप्ती । रवि चंद्र स्वयें हरपती । जेणें प्रकाशें ब्रह्मस्फूर्ती । निर्विषयस्थितीं सूख कोंदे ॥३१॥ ऐसें स्वाभाविक सहज । तेजाचें जे निजतेज । त्याची चिन्मूर्ति पैं द्विभुज । भक्तराज देखे भरत ॥३२॥ श्रीरामाची निजस्थिती । चिन्मात्रैकचैतन्यमूर्ती। अव्यक्त आला व्यक्ती । भक्तभावार्थी साकार ॥३३॥ ऐसा श्रीराम स्वभावेंसीं । आला साकार दशेसी । सगुण मूर्ति भासे कैसी । चिद्विलासी श्रीराम ॥३४॥ जन्मला कौसल्येच्या उदरीं । ऐसी लोकवंदतीची परी । त्या श्रीरामाच्या उदरीं । भरत निर्धारीं विश्व देखे ॥३५॥ श्रीरामाचें पूर्णपण । भक्त जाणती अकिंचन । जे भावार्थे परिपूर्ण । ते स्वरूप जाण जाणती ॥३६॥ श्रीरामाची निजमूर्ती । वर्णितां मौनावल्या श्रुती । शास्त्रें थोटावलीं थाती । राम शब्दार्थी अर्थवेना ॥३७॥ चाटु[8] नाना रस मधुर वाढी । तो चाटु चाखतां न लभे गोडी। तेंवी सांडोनि शब्दार्थ ओढी । पहावी निर्वडी[9] श्रीराममूर्ति ॥३८॥ आकाश बांधतां मोटेंसीं । चौपालवी[10] ये बांधे त्यासी । शब्दें वर्णिता श्रीरामासी । वैखरीसी दशा तैसी ॥३९॥ राम सगुण तोचि निर्गुण । राम परमात्मा परिपूर्ण । चिन्मात्रैक चैतन्यघन । विश्वविश्राम जाण श्रीराम ॥४०॥ त्या श्रीरामाचें वर्णन । वर्णावया मी अति दीन । कृपाळु एका जनार्दन । अर्थवी[11] कथन यथार्थ ॥४१॥ धन्य भाग्य त्या भरताचें । स्वरूप देखत त्या रामाचें । श्रुतिशास्त्रां गुह्य ज्याचें । भरत त्याचें चिन्ह लक्षी ॥४२॥ राम सर्वांगीं

शब्दार्थ - १. संपूर्ण, २. दोनी कटिप्रदेश, ३. मुखचंद्र, ४. अमर्याद, ५. ज्ञात्यांनी, ६. सर्वदा आज्ञाधारक, ७. बंधन, ८. लांकडाची पळी, ९. लक्ष लावून, १०. चौपदरी, ११. अर्थयुक्त करी.

निर्मळ । ते निर्मळीं बिंबले नभ सुनीळ । यालागीं श्यामता सुनीळ । भासे निर्मळ श्रीरामासीं ॥४३॥ राम श्यामता मेघश्याम । त्या श्यामता गर्जवी आब्रह्म । यालागीं राम मेघश्याम । बोलती परम श्रुतिशास्त्रें ॥४४॥ राम निर्मळ परात्पर परम । हेंचि श्रुतिशास्त्रां न कळे वर्म । अंगीं बिंबलें देखोनि व्योम । मेघश्याम राम म्हणती ॥४५॥ यापरी स्वयें श्रीराम । शोभा शोभवी मेघश्याम । त्याच्या पदींचा पदाक्रम[१]। त्रिविक्रम[२] आक्रमें ॥४६॥ सहस्र जिव्हा शेषासी । तेणें बळें निजावेशीं । प्रवर्तला चरणवर्णनासी । शीक[३] त्यासी लागली ॥४७॥ वर्णितां अचिंत्याच्या रूपासी । जिव्हा चिरली क्षणार्धेसीं । लाजां दडाला शेजेसीं । श्रीरामचरणासी न वर्णवे ॥४८॥ त्या श्रीरामाचे श्रीचरण । वर्णावया कैंचें वदन । साधु कृपाळु दीन जन । त्यांचें अवधान बोलवित ॥४९॥ चरणांतळीं शोभा आरक्त । बाळादित्यातें[४] लाजवित । क्षणें जगातें भुलवित । ते चरणीं निश्चित भुलली रमा ॥५०॥ सुरासुरां अतर्क्य माया । जे श्रुतिशास्त्रीं न ये आया । ते रमा माया लवलाह्या । श्रीरामपायां भुलली ॥५१॥ लक्ष्मीचें चपळ लक्षण । नित्य चित्त भोगायतन । चरणीं सुख अत्यंत गहन । रमेसी मोहन नवल नव्हे ॥५२॥ सनकादिकां अति विरक्ती । देहसंग[५] न धरिती हातीं । तेही भुलले अत्यंत प्रीतीं । क्षणही न विसंबती[६] श्रीरामचरणां ॥५३॥ सनकादिक महासज्जन । भ्रमर होवानियां जाण । चरणकमलीं आमोदसेवन । अहर्निशी जाण करिताती ॥५४॥ चरणींचिया सामुद्रिका । न वर्णवे वेदा शेषा । ध्वजवज्रांकुश ऊर्ध्व रेखा । पद्म देखा यवांकित ॥५५॥ तया चिन्हांचे महिमान । श्रोते परिसोत सावधान । अलक्ष्य तयांचे लक्षण । कांहीं सांगेन संक्षेपें ॥५६॥ चहूं मुक्ती देवोनि लाज । चरणीं शोहे भक्तीचा ध्वज । वज्रें निर्दळी कर्मबीज । स्मरणाचा सहज नित्यांकुश ॥५७॥ शोधितसत्वाचेनि आक्रमें । युग्मचरणीं तळपती पद्में । पादतळें अनुरागप्रेमें । त्या शोभा कुंकुमें लाजिजे ॥५८॥ तळीं आरक्त श्यामता देख । जेंवी नभीं इंद्रधनुष्य । शोभा शोभवी अलौकिक । रघकुळटिळकनिजचरणीं ॥५९॥ क्षयरोगें नित्य पीडिला । त्या श्रीरामचरणां शरण आला । नखचंद्रीं जडोनि ठेला । अक्षयी झाला चंद्रमा ॥६०॥ नखचंद्रींचे जे चंद्रकर । सनक सनंदन सनत्कुमार । भक्त होवोनि सत्वर । नित्य चरणामृतसार सेविती ॥६१॥ नखीं भेदलें आवरणजीवन । गंगेंचें तें जन्मस्थान । त्रिपथगामी[७] हें अभिधान[८] । विश्व पावन जियेचेनि ॥६२॥ त्रिगुण जडजाड्या उबगले । श्रीरामचरणां शरण आले । त्रिकोणघोटी होवोनि ठेले । चरणीं मुकले जीवभावा ॥६३॥ जैसें शुद्ध उपासनायंत्र । तैसी घोटी त्रिकोणसुंदर । कळाविया अति मनोहर । चित्कळा सार भासती ॥६४॥ श्रुति आणि स्मृती । दोहीं बाहीं वांकी वाजती । अंदुवा जाण निश्चितीं । उपवेदस्थितिविभागें ॥६५॥ भक्ताची ते जीवनकळा । साधकाचा निजजिव्हाळा । तोडराचा नाद आगळा । प्रळयघंगाळ नाम ज्याचें ॥६६॥ वेदान्त शुद्ध शास्त्र । चरणीं गर्जती तोडर । धन्य धन्य दैत्यांचें शरीर । तोडर निरंतर रुळती चरणीं ॥६७॥ तोडरांची नादशैली । ऐकतां कळिकाळ कापे चळीं । पोटरियांची नव्हाळी । अति कोंवळी सुकुमार ॥६८॥ यंत्रपीठीं वर्ण प्रबळ । तेंवी पोटरिया सरळ । अक्षररसें त्या मांसळ । अति निर्मळ निजतेजें ॥६९॥ जानुचक्र अति वर्तुळ । जैसे आरिसे निजनिर्मळ । निजात्मतेजें स्वरूप तत्काळ । तेथें सकळ आभासे ॥७०॥ अथवा आणिक एक भावो । मज

---

शब्दार्थ - १. पायाचे व्यापणे, २. तीन पावलांनी ब्रह्मांड व्यापणारा, ३. शिक्षा, ४. सकाळच्या नूतन सूर्याला, ५. देहाभिमान, ६. सोडीत नाहीत, ७. तीन मार्गांनी जाणारी, ८. नाव.

गमताहे पहाहो । ऐका तेथींचा नवलावो । अभिप्रावो तो ऐसा ॥७१॥ चक्र शिणलें कंदन करितां । ते शरण आलें रघुनाथा । जानुचक्रीं जडोनि जातां । वंद्य तत्वतां सुरसिद्धां ॥७२॥ श्रीरामजानुचक्र देखतां । काळचक्र वंदी हरिभक्तां । रामचरणांची सामर्थ्यता । श्रुतिशास्त्रां न वर्णवे ॥७३॥ लागतां श्रीरामचरणीं । शिळा उद्धरली तत्क्षणीं । सद्भावें सेवितां अनुदिनीं । लागती चरणीं कळिकाळ ॥७४॥ श्रीरामाचा चरणमहिमा । शास्त्रां न करवे सीमा । श्रुति पावल्या उपरमा । त्या श्रीरामा केंवी वर्णवे ॥७५॥ ऊर मृदु सरळशोभा । तेणें लाजविलें कर्दळीस्तंभा । तिच्या पोटीं वक्रगाभा । अवक्र शोभा रामांकीं ॥७६॥ गगनाहूनि अति सुकुमार । श्रीराममांडिया अरुवार । लागलिया खुपती चंद्रकर । सुकुमारा सुकुमार श्रीरामचंद्र ॥७७॥ जगाचें गुह्य श्रीरघुनाथ । पावावया तयाचा गुह्यार्थ । इतरां कैंचें सामर्थ्य । भावार्थे सेवीत जानकी ॥७८॥ त्यजोनि वासनावासासी[१] । जे निर्बुजले लोकलाजेसी । ते पावती श्रीरामगुह्यासी । अहर्निशीं सुखरूप ॥७९॥ स्वयें अच्छिद्रत्वें मनोहर । आणि पुढिलाचें आच्छादी छिद्र । तोचि कांसे पीतांबर । तेज दुर्धर देदीप्य ॥८०॥ उदयअस्तें विजु शिणली । ते श्रीरामा शरण आली । पीतांबरत्वें कांसे जडली । त्यजोनि वहिली उदयास्त ॥८१॥ कांस कसिली सुरेख । पालवीं[२] मुक्तलग देख । लागतां कांसे एकाएक । भवभय देख होय वाव ॥८२॥ श्रीराम सांपडे सगळा । ते भक्तिभावार्थमेखळा । मध्यें शोभे घननीळा । अलोकिक कळा तेजाची ॥८३॥ किंकिणी आणि ज्वाळमाळा । ऋद्धि सिद्धि झाल्या सकळा । क्षुद्रघंटिकाचा मेळा । सद्विद्या तत्काळ पैं होती ॥८४॥ अति सूक्ष्म मध्य[३] साना[४] । होता अभिमान पंचानना । देखोनी राममध्यरचना । लाजा राना तो गेला ॥८५॥ सावकाश श्रीरामासी । पाहावयां अवस्था पंचाननासी । येवोनि जडले रामकांसेसी । मित्रत्वेंसीं मेखळे ॥८६॥ लागतां श्रीरामकांसेसी। विसरले गमनागमनासी । श्रीरामाची ख्याति ऐसी । कांसे लागी त्यासी उद्धार ॥८७॥ निजभक्तांच्या आर्तीच्या[५] ठायीं । अखंड रामासी रमणें पाहीं । आर्तीवेगळें सर्वथा कांहीं । जाणें नाहीं श्रीरामा ॥८८॥ आर्ती सर्वेंद्रियांचा अर्थ । भक्त श्रीरामीं अर्पित । श्रीराम एकपत्नीव्रत । आर्ती रमत स्वधर्मे ॥८९॥ म्हणोनि भक्तांसी निश्चित । प्राप्त श्रीरामगुह्यार्थ। आर्तीवेगळा रघुनाथ । नव्हे प्राप्त सुरसिद्धां ॥९०॥ लेखणी चुकी पडली मोठी । सांडोनि श्रीरामगोष्टी । पीतांबरीं बैसली दृष्टी । संतीं कृपादृष्टीं सहावें ॥९१॥ सखोल श्रीरामाची नाभि जाण । ब्रह्मा सहस्राब्द[६] बुडतां आपण । ठाव व लागे अणुप्रमाण । झाला खेदक्षीण निजमनीं ॥९२॥ तेणें कृपा आली रघुनाथा । देवोनि नाभिकारता । नाभिकमळीं राखिला धाता । लोककर्ता करोनियां ॥९३॥ उपदेशिलें गुह्यज्ञान । ऐका तयाचें लक्षण। सकळ लोक स्रजितां पूर्ण । न ये कर्माभिमान सर्वथा ॥९४॥ उदरीं त्रैलोक्य सांठोवा । विश्रांति या सकळ जीवां । जेंवी मातृकांचा[७] सांठोवा। दिसे अवघा प्रणवोदरीं ॥९५॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञानव्हाळी । हेचि उदरीं त्रिवळी । सत्कर्में रेखिल्या रोमावळी । हृदयकमळीं शोभती ॥९६॥ श्रीरामाचे हृदयावकाशीं । आकाश लोपलें स्वकार्येंसीं[८]। घनानंद निरवकाशीं । सज्जनांसी विश्रांति ॥९७॥ निवांत समाधीचें सुख । तैसें श्रीरामहृदयीं पदक । संत माणकुळीं[९]

---

शब्दार्थ - १. वासनारूपी वस्त्राला, २. पदराला, ३. कंबर, ४. बारीक, ५. आवडीच्या, ६. हजार वर्षे, ७. वर्णांचा, ८. शब्दांसह. ९. लहान माणिके.

सुरेख । अलौकिक झळकती ॥९८॥ सत्कोंदणें अलौकिकी । संत चिद्रत्नें जडलीं पदकीं । कौस्तुभाची शोभा निकी । लोकालोकीं[1] दुर्लभ ॥९९॥ उदयअस्तें सूर्य शिणला । तो श्रीरामा शरण आला । कौस्तुभ होवोनि कंठी जडला । मुक्त झाला त्रिविध तापा ॥१००॥ अनन्यगतीच्या सद्वृत्ती । तेचि रामीं वैजयंती । सुमनमनाच्या निजवृत्ती । माळा शोभती समिश्रतुळसी ॥१॥ श्रीरामाचा कंबुकंठ[2] । वेदाचें तें मूळ पीठ । स्वरवर्णांची ते वाहती वाट । तेथोनि प्रकट त्रिकांडीं ॥२॥ मुख्यत्वें श्रीराम अबाहु । तेथेंचि शोभती आजानुबाहु । बाहूंचा पराक्रम बहु । द्वैताचा ठाऊ उरों[3] नेदी ॥३॥ अहंरावण महाबळी । त्याची केली रांगोळी । वैर नाहीं जगतीतळीं । आयुधें ठेविलीं यालागीं ॥४॥ श्रीरामाचें शुद्ध ज्ञान । निहृदयीं असें संपूर्ण । तेथें न होवोनि निमग्न । वृथा अज्ञान भ्रममाती ॥५॥ निरसोनि बाह्य साधन । हृदयीं घ्यावया समाधान । ज्ञानमुद्रा दावी आपण । दक्षिण हस्तें श्रीराम ॥६॥ आपुली माया आपुल्यावरी । अलिप्तपणें धरी हरी । राम पाहतां निर्धारी । बाधा न करी हरिमाया ॥७॥ ऐसें करावया निर्धारीं । निजमाया निजकरीं । वामांकी जानकी सुंदरी । दक्षिणकरीं धरियेली ॥८॥ शुद्ध चैतन्याचे सुघटे । अहं सोहं निःशेष आटे । श्रीरामाचे बाहुवटे । कीर्तिमुख चोखटें उपनिषदें ॥९॥ वीर्यधैर्या धैर्य जेणें । श्रीरामाचीं वीरकंकणें । करीं बाणलीं पूर्णपणें । लेणया[4] लेणें श्रीराम ॥११०॥ श्रीराममुद्रा बाणलिया हातीं । तो वंद्य होय त्रिजगतीं । कळिकाळ पायां लागती । चारी मुक्ती आंदण्या[5] ॥११॥ ऐशा दशांगुळीं दशमुद्रा । करीं प्रतिपाळी दशावतारा । हस्तीं धरिली सीता सुंदरा। दशशिरा निर्दाळूनी ॥१२॥ गाळींव आनंदाची मूस देख । कीं सोलींव सुखाचेंही सुख । तें श्रीरामाचें श्रीमुख । नित्य निर्दोष देखिजे ॥१३॥ श्रीरामाचा मुखमयंक[6]। पूर्णत्वें नित्य निष्कलंक । देखोनियां शशांक[7]। लाजा अधोमुख तो झाला ॥१४॥ पक्षीं वाढे पक्षीं मोडे । हे चंद्रासी दुःख गाढें[8]। तेणें दुःखें अंगुष्टीं जडे । जग पायां पडे नखचंद्रीं ॥१५॥ जडतां श्रीरामअंगुष्टीं । चंद्रासी झाली पुष्टितुष्टी । रामचरणीं सुखाच्या कोटी । देखतां दृष्टी आल्हाद ॥१६॥ करितां राममुखावलोकन । निःशेष द्वंद्वदुःखा बोळवण । परानंदतृप्ति गहन । हरिखें पूर्ण कोंदाटे ॥१७॥ अकार उकार मकारस्थितीं । ॐकारीं कर्म निष्कर्मप्राप्तीं । तैशा मुखीं दोभागीं दंतपंक्ती । चतुर्वेदस्थिती चौक मिरवे ॥१८॥ जगाचा आधार ते अधर । श्रीरामअधरें ते सधर । परमामृतासी निजमाहेर । निजजिव्हार सीतेचें ॥१९॥ श्रीरामाची हनुवटी । देखतां सुख वोसंडे सृष्टीं । धन्य देखत्याची दृष्टी । ते जाणे हातवटी हनुमंत ॥१२०॥ देखोनि गंडस्थळांची प्रभा । लाजा सूर्य लोपला उभा । तेथें उदय-अस्तांची वालभा । उदय स्वयंभ गंडस्थळीं ॥२१॥ श्रवणीं कुंडलें मकराकार । हा लौकिक बाह्यविचार । तीं आकारीं शुद्ध निर्विकार । श्रवणें विकार निर्दाळिती ॥२२॥ नवल शोभा त्या श्रवणासीं । नित्य मिळणी निजात्मअंशीं । श्रवणें देखणें देखण्यासी । अंशाअंशीं समरसे ॥२३॥ निःशेष निरसोनि नास्तिक । अवक्र जें कां आस्तिक । निरपेक्ष शुद्ध चोख । तेंचि नासिक राममुखीं ॥२४॥ अल्प अपेक्षा धरितां देख । साधन तितुकें निर्नासिक । नकटा झाला तो साधक । राम सन्मुख भेटेना ॥२५॥ चळता जितुका वायु जाण । तो श्रीरामाचा मुख्य प्राण । श्रीरामाच्या प्राणें जाण । जगाचा प्राण जीतसे ॥२६॥ श्रीरामाचा निजप्राण ।

---

शब्दार्थ - १. उदयास्तमर्यादादर्शक पर्वतांवर, २. शंखाकृती कंठ, ३. ठिकाण, मागमूस, ४. भूषणांना, ५. दासी, ६. मुखचंद्र, ७. चंद्र, ८. मोठे, ९. प्राप्त होते.

तेणें वसंता समाधान । सुवासासी निजजीवन । विश्वजीवन श्रीराम ॥२७॥ चैतन्याचें देखणेपण । श्रीरामनेत्रां आलें शरण । सबाह्य देखणें होवोनि पूर्ण । आपण आपणा देखत ॥२८॥ देखतां श्रीरामाची दृष्टी । अक्षयानंदें जीव उठी । दृश्य द्रष्टा न दिसे त्रिपुटी । हेलावे सृष्टी निजानंदें ॥२९॥ दीपामागें पडसाई । तैसी डोळ्यामागें भिंवई । व्यंकटी सांडोनियां पाहीं । श्रीरामदेहीं निवटल्या ॥१३०॥ श्रीरामाची भ्रुकुटी । रची ब्रह्मांडाच्या कोटी । भ्रूविक्षेप केलिया[1] काळ घोंटी । छेदी गांठी चौदेहां ॥३१॥ जैसें अधिष्ठान निर्मळ । तैसें श्रीरामाचें विशाळ भाळ । सच्चिदानंदपद केवळ । त्रिवळी प्रबळ ललाटीं ॥३२॥ उगाळोनि अहं कठिण । सोहं काढिलें शुद्ध चंदन । तेंही केलें रामार्पण । गंधार्चन रामभाळीं ॥३३॥ प्रेमकुशरसमेळा । टिळक रेखिला पिंवळा । अनुराग[2] अक्षतारंग बहळा[3] । श्रीरामनिढळा शोभत ॥३४॥ मुकुटवर्धनां[4] मुकुटमणी। राम शिरोरत्न राजस्थानीं । श्रीरामाचा मुकुट वर्णी । ऐसा त्रिभुवनीं कोणी असेना ॥३५॥ श्रीराममस्तकावरतें । कांही रितें उरले असतें । तरी मुकुट वानावया पुरतें । अवकाश वाचेतें पैं होता ॥३६॥ श्रीरामाचें स्वरूपवर्णन । करितां चौ वाचां पडिलें मौन । वेद परतले नेति[5] म्हणोन । तेथें मशक मी कोण वर्णावया ॥३७॥ ऐसा साकार तोचि निराकार । निराकार तोचि साकार । रूपासी आला रघुवीर । भासे चराचर निजतेजें ॥३८॥ त्या रामाच्या स्वरूपीं देख । तद्रूपचि अलोलिक । चद्रित्नमंडित विराजे सुरेख । श्रीरामअंका आरूढोनि ॥३९॥ जैसी नाथिलीचि व्योमा । भिन्न भासे नीळिमा । तेंवी रामांकी विराजे रमा । नहोनि श्रीरामावेगळी ॥१४०॥ जेंवी स्वाद आणि साकर । दृति[7] आणि कापूर । रस आणि जैसे नीर । सीता सुंदर तेवी रामीं ॥४१॥ जेंवी कनक आणि कांती । कीं प्रभा आणि ज्योति । भानु आणि दीप्ती । सीता सती तेंवी रामीं ॥४२॥ राम आत्मा हे आत्मज्योति । राम चैतन्य हे चिच्छक्ती । राम पर हे प्रकृती । अभिन्नस्थिती पैं दोघें ॥४३॥ राम स्रष्टा हे सृष्टिस्थिती । राम कर्ता हे कार्यवृत्ती । राम वक्ता हे वचनोक्ती । अर्थप्राप्तिसमवेत ॥४४॥ ऐसें विचारिता तत्वतां । विचार ठाके पैं मागुता । परा वैखरीसीं वर्णितां । श्रीरामीं सर्वथा बुडाला ॥४५॥ सीता आणि रघुनंदन । स्वरूप एक नामें भिन्न । तैसाचि बंधु लक्ष्मण । तदात्मक पूर्ण श्रीरामें ॥४६॥ जैसा अभिषेक रामासी । राज्योपचार आनंदेंसीं । तैसाचि केला सौमित्रासी । व्रतविसर्जनेंसीं आल्हादें ॥४७॥ श्रीरामाचें धनुष्यबाण । स्वयें घेवोनि आपण । पाठीसी उभा लक्ष्मण । सन्नद्ध जाण सर्वदा ॥४८॥ कनकदंड छत्रचामर । सहित जानकी सुंदर । भद्रीं विराजित रघुवीर । जोडोनि कर सन्मुख ॥४९॥ राज्याभिषेकीं अति मंडित । भद्रीं देखोनि रघुनाथ । आनंदभरित पैं समस्त । त्रैलोक्यांत उत्साहो ॥१५०॥

ऋषिसंघैस्तदाकाशे देवैश्च समरुद्गणैः । स्तूयमानस्य रामस्य शुश्रुवे मधुरध्वनिः ॥१॥
प्रजगुर्देवदंगधर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः । अभिषेकं तदर्हस्य रामस्याक्लिष्टकर्मणः ॥२॥

रामराज्याभिषेकामुळे आनंदित होऊन गंधर्वांचे गायन व स्वर्गातील अस्परांचे नृत्य : वेदोक्त मंत्रघोषण ।

ऋषीश्वरीं मांडिलें स्तवन । श्रीरामराज्य सुखैकघन । करिती गर्जन जयशब्दीं ॥५१॥ स्वर्गी आनंदले सुरगण । मिळोनियां सहित मरुद्गण। सुरदुंदुभि त्राहाटिल्या पूर्ण । पुष्पवृष्टि जाण तिहीं केली ॥५२॥ गंधर्व मिळोनि समग्र । मृदु मंजुळ मधुर स्वर । गायन मांडिले

शब्दार्थ - १. वाकडी भिवई, २. प्रेमा, ३. फार, ४. राजांमध्ये, ५. न इति-असे नव्हे, आम्हाला रामस्वरूप समजत नाही असे म्हणून, ६. नसलेली, ७. सुवास

परिकर। श्रीरघुवीरनिजराज्यें ॥५३॥ रंभा मेनका तिलोत्तमा जाण। उर्वशीसहित अप्सरागण। श्रीरामराज्यें आनंदमग्न । येवोनि नर्तन मांडिलें ॥५४॥ श्रीरामाचें अभिषिंचन । पहावया अति प्रीतीकरून । मंडळपति[1] राजे जाण । आले त्वरेनें समकाळें ॥५५॥ नानाविध उपासन । आणोनि पूजिला रघुनंदन । घालोनियां लोटांगण । श्रीरामचरण वंदिले ॥५६॥ विजयकार जयजयकार । ऋषिवरांचे मंत्रस्वर । वैष्णवांचा नामोच्चार । झणत्कार दुंदर्भीचा ॥५७॥ वानरांचा भुभुःकार । गंधर्वांचा उच्च स्वर । अप्सरांचा आलापस्वर । नादें अंबर कोंदलें ॥५८॥ नभ झालें सुखैकघन । दिशा दुमदुमती संपूर्ण । नादें कोंदलें त्रिभुवन । सुख संपूर्ण सर्वांसी ॥५९॥ शून्यत्व सांडोनि गगन । झालें चिदानंदैकघन[2] । परमामृताचे रजःकण । वृष्टी रघुनंदननिजसुखें ॥१६०॥ श्रीरामाच्या राज्यसुखें । आकाश वोळलें चिदाकाशें । वसवूनि सकळांची मानसें । अलिप्त सर्वांसी सर्वदा ॥६१॥ घटकाश मठाकाश । प्राणिमात्रांचें हृदयावकाश । वसवूनि सर्वत्र उदास । अलिप्त आकाश श्रीरामें ॥६२॥ श्रीरामीं सुखावला पवन। सर्वांतरीं प्रवेशोनि पूर्ण । प्राणवृत्ती करी चळण । आसक्त नव्हे जाण सर्वथा ॥६३॥

प्राणी परस्परांतील वैरभाव विसरले : परस्परें प्राणिमात्र । जीवघातें करिती वैर । चाळोनि तयांचे अंतर । प्राणी निर्वैर सर्वदा ॥६४॥ गाईव्याघ्रांसदा वैर । गजसिंहा वैराकार[3] । नकुळसर्पांसी खडतर । स्वाभाविक वैर सर्वदा ॥६५॥ मूषकबिडाळांसी वैर । श्येनबकांसीं वैराकार । ऐसे सांगतां अपार । सर्वत्र वैर प्राणिमात्रां ॥६६॥ जीवशिवांचा आहार । येणें सकळां बद्धवैर । तितुकीं चाळोनि सर्वत्र । प्राणी निर्वैर सर्वदा ॥६७॥ श्रीरामराज्यें वायूसी । निर्वैरता आली त्यासी । मंद शीतळ सुखस्पर्शाशी । बाह्य जगासी निववित ॥६८॥ श्रीरामराज्यतेजासीं । निर्विकारता बाणली कैसी । सांडोनि अहंममतेसी । स्वप्रकाशीं देदीप्य ॥६९॥ स्नेहसूत्रअधिष्ठान । गृहीं प्रयासें मेळवोन । जेणें दीप उजळिला आपण । अमर्याद जाण प्रकाश त्यासी ॥१७०॥ हे प्रयास कांही न करितां । चोर सुखें चोरी करितां । त्यासीही प्रकाश आइता । स्वभावता निजतेजें ॥७१॥ स्वामी यत्न करी निजवित्ता । चोर सिंतरोनि[4] स्वयें नेता । दीपरूपें साक्षी पाहतां । न म्हणे तत्वतां माझें तुझें ॥७२॥ आणिक श्रीराम-राज्यासीं । तेजासीं कळा बाणली कैसी । जे जे भेटों येती त्यासीं । करी आपणाऐसीं तत्काळ ॥७३॥ सव्य[5] येवोनि भेटे चंदन । अपसव्यें घुरे आपण । दोहींचा वास निरसोनि पूर्ण । देदीप्यमान करी अग्नि ॥७४॥ श्रीरामराज्यें जीवन । स्वयें झालें सुखैकघन । सर्वां भूतीं रघुनंदन । निजभजन करितसे ॥७५॥ भूतां परस्परें वैर । वैर स्वभावतां निरंतर । असतां आपण निर्वैर । जीवन करी सर्वांतें ॥७६॥ श्रीरामराज्येंकरोनि जाणा । अति संतोष झाला जीवना । विसरोनि अधोगमना । सुखस्वादना जग निववी ॥७७॥

भूमिः सत्यवती चैव फलवंतश्च पादपाः । गंधवंति च माल्यानि बुभूवु राघवोत्सवे ॥३॥

धरणीमाता प्रमुदित झाली : श्रीरामाचें अभिषिंचन । देखतां धरा सुखैकघन । ऐका त्याचेंही लक्षण । निजलक्षण धरेचें ॥७८॥ येथोनि हे भोय[6] माझी । तेथोनि ते मर्यादा तुझी । सीमाभेदें जुंझती जुंझी । निजपैजीं दिव्य करिती ॥७९॥ दिव्य उतरोनि सुखी होती । एक असत्य ते दिव्य भरिती । तितुकें करोनि अभेदस्थिती । धरा वर्तती अखंडत्वें ॥१८०॥ विषमत्व सांडोनि चित्ता । संपादी दोहींच्या अर्था । माझी माझी म्हणतां भूतां । न मोडे अखंडता धरेची ॥८१॥

---

शब्दार्थ –१. मांडलिक राजे, २. चैतन्यस्वरूपाच्या आनंदाने परिपूर्ण, ३. वैरभाव, ४. फसवून, ५. उजवीकडून, ६. भूमी.

हें श्रीरामराज्याचें सुख । धरेसी बाणलें आत्यंतिक । वनस्पती वोहल्या देख । अलोलिक रसभारें ॥८२॥ सुवासित पुष्पीं सुपक्क फळीं । वृक्ष लगडले तत्काळीं । जीवमात्रीं सुख सकळीं । रसकल्लोळीं वोळली मही ॥८३॥ श्रीरामराज्य ऐसे देख । सकळ सुख अलोलिक । भाट गर्जती असंख्य । रघुनायक निजराजा ॥८४॥ मंत्रस्वर जयजयकार । वानरांचा भुभुःकार। माजी नामाचा उच्चार । श्रीरघुवीर निजविजयी ॥८५॥ नामें प्रायश्चिता धाक । यमलोक ओस निःशेख । श्रीरामराज्यें करोनि देख । यमप्रमुख कांपती चळीं ॥८६॥ एका जनार्दना शरण । श्रीरामाचें अभिषिंचन । आणि स्वरूपाचें वर्णन । आपलें आपण संपविलें ॥८७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामस्वरूपवर्णनं नाम चतुरशीतितमोऽध्याय: ॥८४॥ ओंव्या ॥१८७॥ श्लोक ॥३॥ ॥एवं ॥१९०॥

## अध्याय पंचाऐंशींवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### राज्याविषयी लक्ष्मणाची विरक्ती

**श्रीरामांचा आनंदसोहळा :** श्रीरामाचें अभिषिंचन । आनंदमय त्रिभुवन । भक्तवृंद सुखैकघन । आनंदें पूर्ण गर्जती ॥१॥ भद्रीं बैसला रघुनाथ । ब्रह्मांड सुखें दुमदुमित । विनोदें श्रीरामाचे भक्त । रामसुखार्थ दाविती क्रिया ॥२॥ श्रीरामसुखें संपन्न । संतोषावया रघुनंदन । अग्निक्रीडा[1] मांडिली पूर्ण । औषध भरून रज तम ॥३॥

**दारूकामाचे रूपकात्मक अनुपम सुंदर वर्णन :** तीव्ररजतमांची औषधें । करोनि अग्नियंत्रें सन्नद्धें । श्रीरामभक्तिआनंदें । क्रीडा विनोदें मांडिली ॥४॥ सूक्ष्म ममतेची हवाई[2]। पहिली आणियेली पाहीं । वैराग्यवाती लावितां ठायीं । चिद्गगनीं तेही उसळली ॥५॥ गुरुवाक्यें प्रज्वाळिली । सद्विवेकें आंबुथिली[3]। लागतां हवाई जळाली । क्षणें उडाली चिद्गगनीं ॥६॥ अहंकाराचा बाण कठिण । गुरुवचनें प्रज्वाळितां पूर्ण । उततला[4] न लागतां क्षण । आब्रह्मभुवन प्रकाशलें ॥७॥ सुटतां अहंकाराचा बाण । सोहं जाळिलें चिद्गगन । देखोनियां रघुनंदन । सुखैकघन स्वयें झाला ॥८॥ तंव आणिक नवलपरी । आशातृष्णेच्या चिचुंदरी । भरून आणिल्या झडकरी । पीडिले भारी लोक तिन्हीं ॥९॥ विसरोनि रघुकुळटिळक । पाहूं लागले कौतुक । त्यांसी जाळित उठल्या देख । एक एक शोधूं शोधूं ॥१०॥ वेगें जाळित उरीं शिरीं । भडका उठला हृदयावरी । खांडमिशा तोंडावरी । वस्त्रामाझारीं घुसती ॥११॥ श्रीरामविमुख विषयेंकरोनी । त्यांची होतसे भंगाणी । सोवळ्या धोत्रां दाणादाणी । उघडीं पाडोनी जाळिती ॥१२॥ देखोनि तयांचे कौतुक । भक्त हासती अलोलिक । सात्विक उपहासिती देख । रघुकुळटिळक तटस्थ ॥१३॥ विचित्र संकल्पाच्या फुलवाती । रम्यसुमनाकार भासती । निर्धार करितां निगुतीं । रक्षा निश्चितीं प्रत्यक्ष ॥१४॥ रामभक्ताच्या निरीक्षणयुक्ती । लावोनि अनुसंधानाच्या वाती । श्रीरामदृष्टीं भस्म करिती । क्षणही निश्चिती न लागतां ॥१५॥ कामक्रोधांचे अति उद्भट । भुईनळे पैं घनदाट । माजी अभिनव काळकर्कोट। धूम निघत मदमत्सरांचा ॥१६॥ व्यापीत चालिला गगन । आच्छादित जननयन ।

---

**शब्दार्थ** – १. दारूकाम, २. भुईनळा, ३. शिंपिली, ४. उडाला.

अविवेक्यापीडा गहन । खवट घाण घसां भरे ॥१७॥ देखोनयां श्रीरामभक्त । खवळले अत्यद्‌भुत । अनुभवाचा हत्ती मस्त । रवंदळित[1] सोडिला ॥१८॥ अहंममतेचा नाद क्रूर । त्यातें आच्छादोनि सत्वर । स्वानंदें गर्जोनियां थोर । केला चूर तयाचा ॥१९॥ निजबोध-चंद्रज्योति पूर्ण । तेणें उजळिलें त्रिभुवन । प्रकाश दाटला पूर्ण । मीतूंपण असेना ॥२०॥ ऐसा निजभक्ताचा अद्‌भुत । देखोनियां पुरुषार्थ । संतोषला श्रीरघुनाथ । आलिंगित हृदयेसीं ॥२१॥ श्रीरामहृदया हृदय मिनलें । तेणें रामहृद्गत सगळें । निजहृदया तत्काळ आलें । सुख कोंदलें अगाध ॥२२॥ निजराज्यें सुखैकघन । स्वयें होवोनि रघुनंदन । मिनले जे ऋषिजन । मांडिलें संभावन तयांचें ॥२३॥

सहस्रशतमश्वानां धेनूनां च गवां शतम् । ददौ शतवृषान् पूर्वद्विजेभ्यो मनुजेश्वरः ॥१॥
त्रिंशत्कोटिहिरण्यस्य ब्राह्मणेभ्यो ददौ पुनः । नानाभरणवस्त्राणि महार्हाणि च राघवः ॥२॥

श्रीरामांनी वसिष्ठादिकांची पूजा करून त्यांना सहस्रशः गोदाने व द्रव्यदाने दिली : वसिष्ठादि प्रमुख । ऋषिमंडळीं अलोलिक । श्रीरामासी अभिषेक । मंत्रोक्त देख जिहीं केला ॥२४॥ वेदोक्त विधिपाळण । करोनि होम प्रधान । लोकपाळां संतोषवून । रघुनंदन अभिषेकिला ॥२५॥ तयां ऋषीश्वरांची पूजा । करिता झाला रघुराजा । वसिष्ठ निजगुरू वोजा । प्रथम पूजा तयाची ॥२६॥ कामधेनूचीं शतसहस्रें । सुवर्णशृंगी रौप्यखुरें । सवृषभ युग्में[2] परिकरें । द्रव्यें अपारें कोटिसंख्या ॥२७॥ धान्यकोठारें असंख्य पूर्ण । श्रीरामें सद्‌गुरु पूजिला जाण । तैसेचि ऋषी इतर जन । श्रीरामें आपण पूजिले ॥२८॥ रोड दुर्बळ दीन याचक । श्रीरामदर्शनें सकळां सुख । सांगणें मागणें ठेलें निःशेख । मनोवृत्ति देख नित्यतृप्त ॥२९॥ देखतां श्रीराम श्रीमुख । याचकासी झालें परम सुख । तृप्तीचीं दोंदें पेललीं[3] देख । हरिखें हरिख दाटला ॥३०॥ श्रीराम दानें देतां प्रबळ । नगरी मागत्यांचा दुकाळ । सकळां स्वसुखाचा कल्लोळ । निजानंद केवळ श्रीरामें ॥३१॥ निष्ठा देखोनि अद्‌भुत । कृपेनें वोळला श्रीरघुनाथ । न मागतांचि अभर[4] करित । द्वारीं वोळंगत महासिद्धि ॥३२॥ वस्त्रें भूषणें सुमन चंदन । सुवासित माळा गहन । वसिष्ठा सद्‌गुरुसहित जाण । रामें ब्राह्मण सुखी केले ॥३३॥

देव-दानव-मानव यांचा श्रीरामांकडून सत्कार : ऐसें ब्राह्मणांचे पूजन । श्रीरामें केलें आपण । मंडळवर्ती राजे जाण । त्याचेंही पूजन तैसेंचि ॥३४॥ वस्त्रें भूषणें टिळेमाळा । मंडळवर्ती भूपाळां । पूजिता झाला घनसांवळा । सन्मान सकळां देवोनी ॥३५॥ ब्रह्मा इंद्र ईशान । मरुद्गणेंसीं[5] अमरेंद्र[6] जाण । दानव मानव पन्नग पूर्ण । स्वयें रघुनंदन पूजित ॥३६॥ सकळीं आणिलीं उपायनें[7] । त्याहूनि अधिक कोटिगुणें । स्वयें देवोनि रघुनंदनें । सकळ सुरगण गौरविले ॥३७॥ त्याहूनि अनंत अधिक । श्रीरामें देवोनि निजसुख । सुखी केले सकळ लोक । द्वंद्वदुःख जेथें न रिघत ॥३८॥ जेथें न रिघे मीतूंपण । पावों न शके देहाभिमान । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । त्रिपुटीचें भान जेथ नाहीं ॥३९॥ देखतां श्रीराममुख । एवढें पावले निजसुख । राम कृपाळू नेटक । आत्मत्वें देख निवविले ॥४०॥ निकटवर्ती निजगण । सुग्रीवादि बिभीषण । त्यांची पूजा रघुनंदन । स्वयें आपण करितां झाला ॥४१॥ पूजावया निजगण । स्वयें बोलवी रघुनंदन । तेणें काळें भरत जाण । स्वयें आपण पुढें झाला ॥४२॥ बिभीषण सुग्रीव हनुमंत । अंगदेसीं अति विनवीत । भरतें विनविला रघुनाथ । धर्मयुक्त नीतिवचनें ॥४३॥ पितृआज्ञा निज नेमस्त। चौदा वर्षे वनवासव्रत। स्वामींनी संपादिलें

---

शब्दार्थ - १. नाश करीत, २. जोड्या, ३. भरून आली, ४. तृप्त, ५. देवांसह, ६. इंद्र, ७. नजराणे.

यथार्थ । बंधूसहित स्त्रियेंसीं ॥४४॥ तैसें निजराज्याचें शासन[1] । तुझे आज्ञेकरोनि जाण । केलें राज्यपरिपालन । किंकर[2] दीन मी तुझे ॥४५॥

आपल्याप्रमाणेच लक्ष्मणाला अभिषेक करण्याची रामांना भरताची विनंती : पितृआज्ञानिजनेमांतीं । राज्याभिषेक जया रीतीं । तुम्हीं अंगाकारिला रघुपती । सौमित्र त्या स्थितीं अभिषेका ॥४६॥ सांडोनि आहार विहार । तुच्छ करोनियां शरीर । श्रीरामसेवे नित्य तत्पर । आठी प्रहर सावध ॥४७॥ श्रीरामसेवेचें महिमान । ख्याति वर्णी त्रिभुवन । सौमित्रें जग पावन । सौमित्रें व्रत साच केलें ॥४८॥ देहावरी आल्या आघात[3] । श्रीरामभजनीं नव्हे च्युत[4] । ऐसें शास्त्र गर्जत । तें केलें यथार्थ सौमित्रें ॥४९॥ सांडोनि क्षुधेतृषेची आस । कळिकाळावरी घालोनि कांस । श्रीराम सेविला सावकाश । भाग्य असोस[5] सौमित्राचें ॥५०॥ यौवराज्यभिषिंचन । त्यासी करावें आपण । करोनि श्रमाचें परिहरण । सुखसंपन्न निजराज्यें ॥५१॥ जैसे भरताचें विनवण । तैसें सुग्रीव बिभीषण । अंगदासहित वानरगण । हनुमान आपण विनवीत ॥५२॥ जिंकोनियां निद्रातंद्रा । निःशेष त्यजोनियां आहारा । सौमित्रें सेविलें रामभद्रा । जन्मोद्धारालागोनी ॥५३॥ श्रीरामभजनाची पदवी । आचार्यत्व निजगौरवीं । दीक्षा दाखविली बरवी । ख्याति देवीं वानिजे ॥५४॥ त्या सौमित्राचे अभिषिंचना । यौवराज्य देवोनियां जाणा । संतोषवावें रघुनंदना । तूंचि निजजनां कृपाळु ॥५५॥ भरतआदि निजगण । ऐकोनि तयांचें वचन । संतोषला रघुनंदन । सौमित्र आपण बोलाविला ॥५६॥ कृपापूर्ण रामरावो । सौमित्र बोलावोनि पहाहो । सांगता झाला अन्वयो । श्लोकपर्यायो अवधारा ॥५७॥

नित्यानुरक्तं मेधावी लक्ष्मणं वाक्यमब्रवीत् ॥३॥
आतिष्ठ धर्मज्ञ मया सहेमां गां पूर्वराजाध्युषितां बलेन ।
तुल्यं यथा त्वं पितृभिःपुरस्तात्तैर्यौवराज्ये धुरमुद्वहस्व ॥४॥

श्रीरामकृत लक्ष्मण प्रशंसा व त्याला यौवराज्यपद स्वीकारण्याची आज्ञा : सौमित्रा सुमित्रानंदना । निजमैत्रीच्या अधिष्ठाना । बंधुपणाची अवज्ञा । अणुमात्र जाण तुज नाहीं ॥५८॥ मी एक बंधु अंतरंग । ऐसा अणुमात्र नाहीं दाघ[6] । नीचसेवेसी सर्वांग । तुवा सांग वेंचिलें[7] ॥५९॥ सांडोनि बंधुत्वअभिमान । नीच दासाचेपरी जाण । माझे सेवेसीं वेंचिला प्राण । अंगीं बाण साहोनी ॥६०॥ सांडोनि आहारविहार । श्रीरामभजनीं नित्य तत्पर । निद्रा नाहीं अहोरात्र । निरंतर सावध ॥६१॥ मस्तकीं काष्ठाचे संभार । जीवन[8] वाहिलें निरंतर । बांधोनियां निजउदर । आम्हां फळाहार पुरविला ॥६२॥ त्रिकाळीं चरणक्षाळण । दोघांचें चरणसंवाहन[10]। उसंत[11] नाहीं क्षण । तत्प्रवीण अहर्निशीं ॥६३॥ एक एक दिवसींची सेवा । आठवितां बंधुदेवा। कांप येतसे जीवा । देहभावा उरी कैंची ॥६४॥ सीतेलागीं होवोनि भ्रांत । आप आपणा विसरत । तुज मारूं धावें लात । ते तूं निवांत साहिली ॥६५॥ मी भ्रांत तैं सावध करिसी । मज भागल्या श्रम हरिसी । मज शोकाकुलिताचा फेडिसी । सावकाशीं सकळ श्रम ॥६६॥ तो आठवितां पाहें । हृदय फुटोनि ठिकरिया होये । बहुत बोलावें म्यां काये । शिवतले पाहें चरण तुझे ॥६७॥ तुझिया भजनाचें अंकिलें। जीवें सर्वस्व विकिलें। यावरी तें काय बोलें ।

---

शब्दार्थ - १. प्रतिपाळण, २. दास, ३. दुःख, ४. भ्रष्ट, ५. मोठे, ६. अहंकार, ७. खर्चिले, ८. मोळ्या, ९. पाणी, १०. पाय चेपणे. ११. विश्रांती.

मौन पडिलें चहूं वाचां ॥६८॥ निजपित्याचें राज्य आहे । तें दोघे चालवूं समन्वयें[1] । पितृआज्ञा ऐसीच आहे । ते तूं स्वयें अंगीकारीं ॥६९॥ चौदा वर्षे नेमस्त । पितृआज्ञा राज्यीं भरत । तैसेंचि आम्हां नेमस्त । वनवासप्रत तितुकेंचि ॥७०॥ पाळोनि पितृआज्ञेसी । आम्ही आलों निजराज्यासी । वसिष्ठें अभिषेकिलें आम्हांसी । तूं यौवराज्यासी अंगीकारीं ॥७१॥ म्हणोनि निजकृपापूर्वक । आज्ञापिता रघुकुळटिळक । येरू झाला पैं साशंक । विघ्न अलोलिक मज आलें ॥७२॥ यौवराज्यभिषिंचन । करावया रघुनंदन । स्वयें करी आज्ञापन । येरू उद्विग्न स्वयें झाला ॥७३॥

ते ऐकताच लक्ष्मणाला दुःख होऊन तो मानसी उद्विग्न झाला : सौमित्र मर्यादेसी मंडन । स्वामीसी न देववे प्रतिवचन । अति संकोचित झालें मन । घाली लोटांगण हरिचरणीं ॥७४॥ अश्रु पूर्ण आले नयनीं । कंठ दाटला बाष्पेंकरोनी । भ्रमित झाला हृदयभुवनीं । गिरा[2] वचनीं पांगुळली[2] ॥७५॥ प्रेमें उकसांबुकसीं रडे । स्फुंदस्फुंदोनि पायां पडे । विघ्न आले मज रोकडें । कोणीकडे जाऊं आतां ॥७६॥ कां क्षोभला रघुनंदन । कांही अपराध घडला पूर्ण । त्याचें हेंचि दिसे चिन्ह । राज्याभिषिंचन सौमित्रा ॥७७॥ श्रीरामासी सकळ सुमित्र । तेणें तो सकळांचा कुमित्र । मजसीं मांडिला वैराकार । राज्यभार देऊं पाहती ॥७८॥ श्रीरामराज्यें सकळां सुख । तेंचि मज ओढवलें दुःख । पूर्ण क्षोभला रघुकुळटिळक । गिळिलों अशेख महापापें ॥७९॥ वनवासीं एकाएकीं असतां । अपराध घडला न कळतां । तेणें क्षोभ आला रघुनाथा । राज्याभिषेक मज करी ॥८०॥ राज्यामाजी परम सुख । ऐसा जनवाद असे देख । पुण्यफळ अलोलिक । ऐसें लोक बोलती ॥८१॥ पुण्य नव्हे पातक । माझी प्रतीति[3] निष्टंक[4] । ऐक तयाचा विवेक । मतिविशेष सांगेन ॥८२॥

राज्यमदाचे दुष्परिणाम : राज्यमद चढल्या देहीं । राम सर्वथा नाठवे पाहीं । सर्वेंद्रियें अंध पाहीं । कार्यकारण कांहीं स्मरेना ॥८३॥ अंतरीं संचरल्या भोगकाम[5] । कोणाची सेचा कैंचा राम । सर्वथा नाठवे धर्माधर्म । पडे भ्रमें अति अंध ॥८४॥ सर्प लागलिया जाणा । बुद्धि पालटे तत्क्षणां । कटुमधुराचिया ज्ञाना । विंवचना[6] कळेना ॥८५॥ अत्यंक कटु निंब कैसा । गोड म्हणोनि खाये घसघसां । गूळ टाकी निंब जैसा । भ्रम मानसा दृढत्वें ॥८६॥ भ्रम चढत अंतःकरणीं । तेचि इंद्रियां विपरीत करणी । विषयसेवन अनुदिनीं । आणिक मनीं नाठवे ॥८७॥ विषय म्हणों विषासमान । यांसंगें अधःपतन । ऐका तयाचें लक्षण । निजचिन्ह नित्यत्वें ॥८८॥

विषं समानं विषयो यकाराद्विषयोऽधिकः विषमेकाकिनं हंति विषयाश्च पुनःपुनः ॥५॥

विषयसंगतीचे परिणाम : विषय म्हणों विषासमान । तरी विषाहूनि विषय गहन । विषभक्षणें एकदां मरण । पुनःपुन्हां पतन विषयार्थी ॥८९॥ स्वभावें विषय दृष्टी पडतां । तत्काळ मोह उपजे चित्ता । ऐका त्याचीही व्यवस्था । घातकता वृत्तीची ॥९०॥ लसुणाचे संगतीं जाण । कस्तूरीचें आच्छादे सुवासपण । दुर्गंधीचें बळ दारुण । सुवास जाण गिळोनि जाय ॥९१॥ राज्यभोगविषयो पूर्ण । अखंड भोगाचें अधिष्ठान । स्रक्चंदनादि[7] गहन । भोग दाटून पुढें येती ॥९२॥ भोग आदळल्या अंगेंसीं । दाटोनि प्रवेशती मानसीं । क्षणें भुलविती प्राण्यासी । सावधानतेसी ठाच कैंचा ॥९३॥ अणुमात्र विषयस्थिती । हिताहित कोण चिंती । विषय तो परमघाती । नरकप्राप्ती आकल्प ॥९४॥ तेथें कैंचा रघुनंदन । कोण स्मरे श्रीरामभजन । कैंचा परमार्थ कैंचें ज्ञान । भ्रमित मन होवोनि ठाके ॥९५॥ कैंचा जप कैंचें ध्यान । कैंचा यज्ञ

शब्दार्थ - १. एकमेकांच्या विचाराने, २. मुखाने बोलवेना, ३. अनुभव, ४. खरोखर, ५. विषयेच्छा, ६. विचार, ७. पुष्पमाला, चंदन.

कैंचें ज्ञान । कोण स्मरे रघुनंदन । विषयबंधन अनिवार ॥९६॥ विसरोनियां रघुनाथा । नरकी बुडिजे तत्वतां । एवढी अंगी वाजे अवस्था । अति बाधकता विषयांची ॥९७॥

लक्ष्मणाची वनवासातील रामसेवा : वनवासीं असतां पूर्ण । अखंडता रामानुसंधान । वना जाय फळांलागून । तेथेंही ध्यान खंडेना ॥९८॥ आसनीं भोजनीं शयनीं । स्नानी दानीं गमनागमनीं । जागृतिसुषुप्तिस्वप्नीं । अखंड चिंतनीं श्रीराम ॥९९॥ श्रवणीं राम नयनीं राम । वाचेसी वदनीं नित्य राम । अखंड हृदयीं चिंतनीं राम । ध्यानीं राम सर्वदा ॥१००॥ करीं चरणसंवाहन । चरणीं नित्य प्रदक्षिण । आलोडोनियां[1] सकळ वन । फळभोजना फळें आणीं ॥१॥ रात्री होवोनि जागारी । फेरे घालीं निरंतरीं । ऐसी श्रीरामसेवा अहोरात्रीं । सर्वोपरी करितसें ॥२॥ चरणक्षाळणा आणीं जीवन । त्रिकाळ करीं पादक्षाळण । त्रिकाळ करीं नीराजन । मुखावलोन त्रिकाळ ॥३॥ श्रीरामहोमालागून । नित्य माथा वाहें इंधन[2] । तेणें मी सुखैकघन । आनंदमग्न सर्वदा ॥४॥ श्रीरामसेवा करितां पूर्ण । जिंतोनिया मानाभिमान । छेदिलें मी देहबंधन । स्वरूप चिद्धन पावावया ॥५॥ तेथें अंगीकारितां राज्यासी । अत्यंत होईन विषयविलासी । राम नाठवे मानसीं । अधःपातासी जाईन तेणें ॥६॥ म्हणाल राज्यीं श्रीरघुनाथ । असतां होई न विषयासक्त । तरी विषयबाधा अद्भुत । तुजही निश्चित न होईल ॥७॥ राम निर्विषय तुज कां विषय । ऐसा सुचला जरी अन्वय । तेही विषयींचा अभिप्राय । सावधान परिसावा ॥८॥

श्रीरामांची निर्विषयता : राम अवतारा अवतारी । राम व्यापक चराचरीं । रामीं मिथ्या नरनारी । विषयउरी तेथें कैंची ॥९॥ पूर्णब्रह्म रघुनंदन । तेथें मिथ्या राज्यभान । राम नित्य सावधान । ऐका चिन्ह सांगेन ॥११०॥ विश्वामित्रयागाप्रती । अनिद्र राहोनि सात रातीं । राक्षसांची जाति व्यक्ती । केली शांत[3] श्रीरामें ॥११॥ सुबाहु वधिला बाणधारा । मारीच उडविला अंबरा । साह्य व्हावया दशवक्त्रा । ठेविला पुरा तद्वध ॥१२॥ देखता ऋषिवरांचा पाळा[4] । चरणीं उद्धरली शिळा । पर्णावया जनकबाळा । यागा आला जनकाच्या ॥१३॥ धनुष्य चढवितां गुण । धुळीं मेळविला रावण । तें भंगिलें न लागतां क्षण । जनकनंदिनी पर्णिली[5] ॥१४॥ वडवानळ क्षात्रकुळासी । एकवीस वेळां धरित्रीसी । केलें निःक्षत्री वेगेंसीं । त्या भार्गवासी गांजिलें ॥१५॥ सांडोनियां क्षात्रदर्पा । वना धाडियेलें तपा । त्या श्रीरामप्रतापा । वाग्जल्पा केंवी वर्णवे ॥१६॥ त्यागोनियां निजराज्यासी । झाला वनस्थ वनवासी । विषयलोभ श्रीरामासी । नाहीं मानसीं सर्वथा ॥१७॥ स्वयें वर्जिता दशरथ । न सांडी वनवासव्रत । येवोनियां भरत । अति निघात[6] मांडिला ॥१८॥ त्याचा न करोनि अंगीकार । बोळविला भरत वीर । होवोनियां वनवासी वनचर । ख्यातिचरित्रें पैं केलीं ॥१९॥ म्हणाल असेल प्रतिष्ठाकाम । अथवा विषयी असेल राम । सुखें वनीं विषयाराम । होत असे परम सीतेसीं ॥१२०॥ दशग्रीवें नेता सीता । स्वयें दाविली तेचि अवस्था । झाडा खोडा खेंव देता । होय गर्जता सीते सीते ॥२१॥ आम्ही म्हणों विषयी राम । सीतेसाठी चढला भ्रम । तंव तो सर्वथा निष्काम । परब्रह्म श्रीराम ॥२२॥ भ्रांत देखोनि रघुनाथा । छळूं आली शिवकांता । अति सुंदर होवोनि सीता । श्रीरघुनाथापुढें ठेली ॥२३॥ राम बोभाये[7] सीता सीता । उमा ओ दे रघुनाथा । तीतें सांडोनि तत्वतां । होय आळविता आनौतें[8] ॥२४॥ राम धांवे आणिकीकडे । उमा राहे येवोनि पुढें । रामें ओळखिली निवाडें । आम्ही पुढें जाणां ना ॥२५॥ मी सांगे पुढें

---

शब्दार्थ - १. फिरून, २. लाकडे, ३. नाहीशी, ४. समुदाय, ५. वरिली, ६. अति आकांत, ७. हाका मारी, ८. अन्यत्र, दुसऱ्याला.

सीता । राम न मानी सर्वथा । करूं धांवे माझ्या घाता । कैंची सीता म्हणोनी ॥२६॥ टक[1] देवांदानवांसी । टक पडली सुरसिद्धांसी । पुढें देखतां सीतेसी । राम तिसी नोळखे ॥२७॥ हातीं धरितां श्रीरामासी । राम निखंदी[2] तियेसी । आई कां वो झोंबसी । शंकरासी त्यजुनियां ॥२८॥ स्वामी सांडोनि कैलासीं । परपुरुषा का हो छळिसी । तुझ्या लागतों चरणांसी । सोडीं आम्हांसी जननिये ॥२९॥ नाहीं कामाचा अंकुर । क्रोध नाहीं अणुमात्र । नित्य सावध श्रीरामचंद्र । उमा सत्वर नमियेली ॥१३०॥ तेणें खोंचली जिव्हारीं । उमा श्रीरामचरण धरी । वृथा भ्रमसी कामाचारी । कोणेपरी श्रीरामा ॥३१॥ राम म्हणे शिवापासीं । पुसों जायें वो वेगेंसीं । स्वमुखें पैं निजकीर्तीसी । कोणासीही नये सांगू ॥३२॥ सांडोनियां कपटच्छळण । उमा झाली अनन्य शरण । तिसी देवोनि समाधान । केली बोळवण कैलासा ॥३३॥ ऐसा श्रीराम निष्काम । तेथें कैंचा रिघे काम । ऐकतां श्रीरामाचें नाम । होय भस्म कामाचें ॥३४॥ श्रीरामाची सावधानता । श्रीरामचि जाणे तत्वतां । तें नये आणिकाचे हाता । अवतारसामर्थ्यता रामाची ॥३५॥ श्रीरामें अवतारा अवतारसत्ता । श्रीराम प्रकृतिपुरुषांचा कर्ता । त्या श्रीरामाची सामर्थ्यता । नये हाता आणिकांच्या ॥३६॥ असो श्रीरामाची कथा । अनुसरोनि भरतव्रता । अंगीकारुनी युवराजता । आज्ञा रघुनाथाची पाळावी ॥३७॥ तेहि विषयींचा वृतांत । सावध ऐका सुनिश्चित । संपादावया वनवासव्रत । केलें अद्भुत श्रीरामें ॥३८॥ वधोनियां लंकानाथ । संस्थापिला शरणागत । बंदी सोडवोनि देव समस्त । स्थापिले निश्चित स्वपदीं ॥३९॥ मुक्त करोनि जनस्थान । ब्राह्मणांसी द्यावें दान । म्हणोनियां रघुनंदन । भरत आपण अनुग्रहिला ॥१४०॥ राज्यीं असोनि निर्लोभता । देहीं असोनि विदेहता । भोगीं असोनि अभोक्ता । श्रीरघुनाथाचेनि धर्में ॥४१॥ मिष[3] करोनि पादुकांचें । अंतरीं प्रवेशला त्याचे । तेणें सामर्थ्य भरताचें । वंदी साचें त्रैलोक्य ॥४२॥ श्रीराम आणि रावण । अलौकिक युद्धत्राण[4] । आणिका गोष्टी न करवे जाण । थरकांप पूर्ण चित्तासी ॥४३॥ तैसा राम देव भरत भक्त । हें त्याचें त्यासीच साजे व्रत । येर शब्दावरी श्लाघत । परी शब्दार्थ लाभेना ॥४४॥ म्हणोनि देवपण रघुनाथीं । भक्तपण साजे भरतीं । येरां न साधेचि युक्ती । विषयगतीं आदळिजे ॥४५॥ स्मरता श्रीरामनाम । विषय होती भस्म । तेथें करितां भजनधर्म । विषय दुर्गम कोणासी ॥४६॥

मला यौवराज्यपद नको, ते भरताला द्यावे अशी लक्ष्मणाची वसिष्ठांना प्रार्थना : ऐसा आहे निश्चितार्थ । श्रुतिशास्त्रें साक्षी वेदांत । तरी राज्या शिवेना माझें चित्त । आण निश्चित श्रीरामाची ॥४७॥ स्वामी वसिष्ठा सत्य जाण । शिवितले जी तुझे चरण । राज्य न शिवें आपण । श्रीरामचरण सांडूनी ॥४८॥ मनसा वाचा कर्मणा । राज्यलोभ नाहीं जाणा । संदेह न धरावा आपणा । सत्य प्रमाण हें माझें ॥४९॥ राज्यीं असोनि भरत । तपें कष्टला अद्भुत । सकळ भोगविरक्त । होवोनि रघुनाथ सेविला ॥१५०॥ त्यासी करोनि अभिषिंचन । भरत सुखावीं पूर्ण । तेणें मज सुख गहन । भरता अभिषिंचन देखिलिया ॥५१॥ आणि राज्यभारहस्तक्रिया[5] । मज नाहीं जी गुरुवर्या । भरत युक्ति राज्याचिया । निःसंदेह जाणत ॥५२॥ चौदा वर्षें अलिप्तपणें[6] । श्रीरामाहूनि अधिकगुणें । राज्यपाळण भरतें येणें । सुखसंपन्नें नांदती प्रजा ॥५३॥ श्रीरामें सुख सकळांसी । त्याहूनि भरता विशेषीं । वर्णितां श्रीरामगुणांसीं । सुखैकराशी समस्तां ॥५४॥ देशोदेशींचे भूपती । भरतमुखें श्रीराम कीर्ती । ऐकावया अति प्रीतीं । भरता येती

---

शब्दार्थ – १. भ्रांती, २. तिरस्कार करी, ३. निमित्त, ४. युद्धसामर्थ्य, ५. राज्य चालविण्याची कला, ६. निरिच्छतेने.

लोटांगणीं ॥५५॥ असो भूपाळांचें वृत्त । महाऋषि जे विख्यात । सदा ब्रह्मानंदें तृप्त । तेही येत भरता पैं ॥५६॥ सांडोनिया निजाश्रम । श्रीरामकीर्तीसी सप्रेम । येवोनियां ऋषिसत्तम । आल्हादें परम श्रवण करिती ॥५७॥ श्रीरामकीर्तीचिया प्रीतीं । अयोध्येसीं अद्‌भुत यती । धन्य भरताची संगती । श्रीरामकीर्ती सुख सर्वां ॥५८॥ म्हणोनि भरतासी आपण । यौवराज्यीं अभिषंचून । सुखी करावे सकळ जन । कीर्ति पावन श्रीरामें ॥५९॥ म्हणोनि सौमित्रें आपण। घालोनि गुरूसी लोटांगण । धरिले श्रीरामाचे चरण । करावें अभिषिंचन भरतासी ॥१६०॥

लक्ष्मणाची विरक्ती पाहून सर्वजण विस्मयचकित : गुरूचे शिवोनियां चरण । सौमित्रें वाहिली आण । देखोनि त्याचें निर्वाण । श्रीरघुनंदन तटस्थ ॥६१॥ सभा झाली तटस्थभूत । सुर सिद्ध अति विस्मित । ब्रह्मादिक चाकाटत[1] । लोकपाळ तेथ वेडावले ॥६२॥ देखोनियां सौमित्राची विरक्ती । सुमनें वर्षल्या सुरपंक्ती । जय जय गर्जे त्रिजगती । सभाग्य निश्चितीं सौमित्र ॥६३॥ सर्वस्व त्यजोनि वहिला । श्रीरामसेवे वना गेला । सर्वभावें राम सेविला । त्यजूनि दादुला[2] आहारातें ॥६४॥ परतोनि आलिया राज्यासी । राज्यलोभ नाहीं मानसीं । सौमित्राच्या भाग्यासी । सीमा वेदांसी न करवे ॥६५॥

कोणाला यौवराज्याभिषेक करावा असा प्रश्न रामांनी विचारल्यावरून भरतालाच अभिषेक करावा असे वसिष्ठांचे रामांना उत्तर : सौमित्र न घे अभिषेकासी । यौवराज्यासी स्थिती कैसी । अभिषेक करावा कोणासी । श्रीवसिष्ठासी राम पुसे ॥६६॥ सौमित्राची निर्विषयता । येणें संतोष वसिष्ठचित्ता । सौमित्र आलिंगोनि तत्वतां । होय बोलता रामासी ॥६७॥ तूं अंतर्यामी रघुवीर । जाणसी सकळांचे अंतर । आम्हांसि पुसणें विचार । हा वृद्धाचार राखिसी ॥६८॥ तुझें नाम अंतर्यामी । अंतर जाणता तूं स्वामी । काय विचार सांगणें आम्हीं । तुमचें तुम्ही विचारा ॥६९॥ ज्याची जैसी अंतर्वृत्ती । जो भजे जैसिया रीतीं । त्याचिया मनोरथाप्रती । निजविश्रांती तूं दाता ॥१७०॥ सांडोनि तुझें चरणसेवन । सौमित्रासी राज्याभिषिंचन । सर्वथा नाहीं नाही जाण । वाहून आण सांगतसें ॥७१॥ ज्यासी तुझ्या चरणीं प्रीती । त्यासी बळेंचि रघुपती । राज्य देणें न घडे निश्चितीं । नये वृत्तीसी खेद करूं ॥७२॥ आण राज्यनीति-विचार । ज्यासी जेथें नाहीं आदर । त्यावरी करितां बलात्कार । विकळ समग्र होऊं पाहे ॥७३॥ सौमित्र राज्यीं उदासीन । तो केवीं करी राज्यशासन[3] । तूं श्रीराम सर्वज्ञ । योग्यायोग्य पूर्ण जाणसी ॥७४॥ भरत सर्वार्थी सावधान । ज्ञानें विरक्ती श्रीरामभजन । सकळार्थी कुशल पूर्ण । करीं अभिषिंचन भरतासी ॥७५॥ ऐकोनि श्रीवसिष्ठवचन । श्रीराम झाला सुखैकघन । स्वयें उठोनि आपण । सौमित्र धरोनि आलिंगिला ॥७६॥ श्रीरामहृदया हृदय मिनलें । दुणें वैराग्यपुट[4] झालें । सबाह्य स्वरूप कोंदलें । अहाळबहाळ[5] रामाचें ॥७७॥

मनोरथ पूर्ण केल्याबद्दल लक्ष्मणाचे रामांना वंदन व रामस्तुती : चरणांवरी ठेवोनि माथा । सौमित्र विनवी रघुनाथा । मनोरथ पूर्ण करितां । कृपावंता श्रीरामा ॥७८॥ तूं अनाथाची माउली । आर्त श्रांतांची साउली । निजजनां कल्पवल्ली । श्रुतीची[6] बोली ऐकिजे ॥७९॥ तें आजि आले फळा । प्रसन्न झालासी घननीळा । सोडविलें सकळां । घोर दुःखापासूनी ॥१८०॥ आजि भाग्य आलें फळासी । चुकोनियां राज्यभ्रमासी । अधिकार लाधलों सेवेसी । निजहरिखेंसीं

---

शब्दार्थ - १. चकित झाले, २. समर्थ, ३. राज्याचे प्रतिपाळण, ४. वैराग्याचे कवच, ५. अघळपघळ, ६. वेदाची.

नाचत ॥८१॥ यौवराज्याभिषिंचन । भरता करील रघुनंदन । शत्रुघ्ना सेनानीपण । सकळ जन सुखमय ॥८२॥ ते कथा अति गहन । श्रोतीं द्यावें अवधान । एका जनार्दना शरण । रामायण अति रम्य ॥१८३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां सौमित्रविरक्ति-कथनं नाम पंचाशीतितमोऽध्यायः ॥८५॥ ओंव्या ॥१८३॥ श्लोक ॥५॥ एवं ॥१८८॥

## अध्याय शहाऐंशींवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### भरताला अभिषेक

रामें प्रार्थितां बहुत रीतीं । राज्य न घेचि ऊर्मिलापती । तेणें तटस्थ सुरपंक्ती । वानर चित्तीं विस्मित ॥१॥

सर्वात्मना पर्यनुनीयमानो यदा न सौमित्रिरुपैति योगम् ।
नियुज्यमानो भुवि यौवराज्ये ततोऽभ्यषिंचद्भरतं महात्मा ॥१॥

यौवराज्यपद स्वीकारण्याची भरताला सर्वांची विनंती : भरत शत्रुघ्न बिभीषण । सुग्रीवादि वानरगण । इंद्रब्रह्मादि सुरगण । प्रार्थितां लक्ष्मण राज्य न घे ॥२॥ वसिष्ठादि रघुपती । तिहीं प्रार्थिला बहुत रीतीं । राज्य न घे ऊर्मिलापती । विस्मित चित्तीं सुरसिद्ध ॥३॥ तेणें काळें भरतासी । सकळीं प्राथिलें प्रीतींसीं । सौमित्र न घे यौवराज्यासी । तूं विनंतीसी अंगीकारीं ॥४॥

त्यामुळे रामभक्तीत अंतर पडेल म्हणून भरताचा नकार : ऐकोनि सकळांचे वचन । भरत विवंची आपण । अति कुशल सुमित्रानंदन । राज्यग्रहण न करीचि ॥५॥ राज्यीं असतां निमेषगती । अंध होवोनि ठाके वृत्ती । कैंचा राम कोण भक्ती । उन्मत्त स्थिति राज्यमद ॥६॥ याचि कारणें लक्ष्मण । स्वयें न घे अभिषिंचन । बाप सौमित्राचें ज्ञान । अनवच्छिन्न[1] निर्लोभ ॥७॥ ऐसें विचारोनि मनांत । भरत राहिला तटस्थ । युक्ति खुंटल्या समस्त । निश्चितार्थ योजेना ॥८॥ कांही न देववे प्रत्युत्तर । निवांत राहिला भरतवीर । तेणें काळें रघुवीर । पाहे सत्वर सद्गुरूकडे ॥९॥

वसिष्ठांचा भरताला उपदेश : जाणोनि श्रीरामाचें मनोज्ञ[2] । सद्गुरु बोलती आपण । भरता ऐकें सावधान । राज्यशासनकर्तव्यता ॥१०॥ जेणें कारणें तटस्थ । तूं राहिलासि निवांत । तें सकळ मनोगत । आम्हां साद्यंत कळों आलें ॥११॥ अंगीकारितां राज्यस्थिती । अंध होवोनि ठाके वृत्ती । सर्वथा नाठवे रघुपती । निमग्न वृत्ति मोहपंकीं ॥१२॥ तेचिविशीं श्रीरामकृपा । सावध ऐकें भरत बापा । श्रीरामनामेंचि पहा पां । भस्म पापाचें होय ॥१३॥ मोह निजपापाचें फळ । सेवितां रघुकुळपाळ । कैंवी राहती पापमळ । नामेंचि केवळ भस्म होती ॥१४॥ ज्याचेनि नामें पाप पळे । त्याचेनि भजनें वृत्ति मळे । ऐसें न मानावें राउळें[3] । निजभजनबळें उद्धरी ॥१५॥ निजभजनाचिया प्रीतीं । भक्त उद्धरी रघुपती । तेच श्रीरामाची वचनोक्ती । सावध चित्तीं परियेसीं ॥१६॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः । मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥२॥

रामभक्ताला विषयाधा होत नाही असे वसिष्ठांनी भरताला सांगितले : श्रीरामाचें वचन । भक्ताप्रति सनातन । भरता ऐकें सावधान । अति गहन निजनिष्ठा ॥१७॥ माझ्या ठायीं ठेउनी मन । सर्वकर्मी वर्तता जाण । माझें स्वरूप सनातन । न लागतां क्षण तेथें पावे ॥१८॥ स्वधर्माच्या

---

शब्दार्थ - १. अमर्याद, २. अभिप्राय, ३. समर्थनें.

चोखाळीं[1] । सर्वात्मक मूर्ति भली । निजप्रीतीच्या कल्लोळीं । सर्व काळीं पूजित ॥१९॥ जेवढी माझी व्यापती । तेवढी करोनि चित्तवृत्ती । नित्य नवी चढती प्रीती । मातें भजती मी होउनी ॥२०॥ माझा आश्रयो मी होऊन । ऐक तयाचें लक्षण । सांडोनियां आपुलेपण । आश्रय लवण जळा जेंवी ॥२१॥ कां सर्वत्र प्रभंजन[2] । गगनीं विचरे आपण । भागोनि जेथें होय लीन । गगनीं गगन होवोनियां ॥२२॥ तैसा कायें मनें वाचा । माझ्या निजात्म-स्वरूपाचा । निश्चयो करोनि साचा । मद्भजनाचा आदर ॥२३॥ तो मज आंतबाहेरी । मी तया सबाह्याभ्यंतरीं । त्यासीही गत्यंतराची परी । बोलतां निर्धारीं जीभ तुटे ॥२४॥ त्यासी बाध्यबाधकसंबंध । कैंचा विधि कैंचा निषेध । सबाह्य सच्चिदानंद । स्वरूप शुद्ध स्वयें होती ॥२५॥ ऐसे मी होवोनि मातें भजती । ते देहांतीं मातें पावती । इतका विलंब कोणाप्रती । मुळींच असती मद्रूप ॥२६॥ तो आमुचें देवतार्चन । आम्ही त्याचें करूं पूजन । तो आमुचें ध्येय पूर्ण । करूं ध्यान आम्ही त्याचें ॥२७॥ ऐसा निजभक्तां रघुनाथ । सर्व कर्मीं संरक्षित । तुज भय काय येथ । आज्ञा निश्चित अंगीकारीं ॥२८॥

श्रीरामांचे मनोगत वसिष्ठमुखाने ऐकल्यावर भरताची अनुमती. भरताचा अभिषेक सोहळा : ऐसें श्रीरामाचें मनोज्ञ । सद्गुरुमुखें निरूपण । भरत जाणोनी संपूर्ण । मस्तकीं वचनार्थ वंदिला ॥२९॥ जैसा श्रीरामा अभिषेक । त्याहूनि भरता केला विशेख । अभिषेकितां रघुकुळ-टिळक । अलोलिक निजसोहळा ॥३०॥ सुमनें चंदनें गंधार्चनें । टिळेमाळा विचित्रभरणें । चिदंबराचीं प्रावरणें । अलंकार चिद्रत्नें जडित ॥३१॥ भावार्थाचें सिंहासन । चैतन्य मृदोलिया[3] सुलक्षण । आनंदाचें वोठांगण[4] । भरता रघुनंदन अर्पित ॥३२॥ सिंहासनीं अति सत्वर । भरता बैसवी श्रीरामचंद्र । तन्मयाचें[5] धरी छत्र । व्यजन चामर बोधाचें ॥३३॥ चिद्रत्नांची नित्य दीप्ती । भरता उदयप्रकाशस्थिती । स्वयें अर्पिली रघुपती । अगाध स्थिति भाग्याची ॥३४॥ सच्चिदानंद पदें तिन्ही । भरतीं सांडिलीं निंबलोणीं । तेहीविषींची विनवणी । सावधानीं अवधारा ॥३५॥ असताचे निराकरणें । निजवस्तूसी सत् म्हणणे । जडाच्या विवंचनें । चिद् म्हणणें वस्तूतें ॥३६॥ सुखाची करितां व्यावृती[6] । आनंदमय वस्तूसी म्हणती । एवं त्रिपदाची स्थिती । अपवादभ्रांती वस्तूची ॥३७॥ त्रिगुण त्रिमात्रातीत पर । त्रिपदें निरसोनि साचार । अभिषेकिला भरतवीर । कृपा अपार भक्ताची ॥३८॥ ऐसें अभिषेकितां भरता । कार्यकारणकर्तव्यता । जितुकी श्रीरामाची सत्ता । आली हाता भरताच्या ॥३९॥ न सांगतां रघुनंदन । राज्यभारकार्यकारण । भरत संपादी संपूर्ण । नित्य सावधान श्रीरामीं ॥४०॥ ऐसा श्रीरामें अभिषेकितां । मंत्रस्वरमंत्राक्षता । ऋषीं अभिषेकिलें भरता । विबुधीं[7] तत्वतां सुमनाभिषेक ॥४१॥ त्राहाटिल्या सुरदुंदुभी । जयजयकार झाला नभी । सिद्ध नाचती निजवालभीं[8] । पद्मनाभीं निजराज्य ॥४२॥ श्रीराम देव भरत भक्त । दोनी अभिषेकांची मात । अति अद्भुत चरितार्थ । त्रैलोक्यांत उत्सावो ॥४३॥ जयजयकार सिद्धांचा । दुंदुभिनाद विबुधांचा । मंत्रोच्चार द्विजांचा । धन्य भाग्याचा वीर भरत ॥४४॥ भुभु:कार वानरांचा । नादस्वर गंधर्वांचा । नृत्यगजर अप्सरांचा । श्रीरामाच्या निजराज्यीं ॥४५॥ देवभक्तांच्या अभिषेकीं । सुर सिद्ध नागलोकीं । आनंदमय त्रिलोकीं । सत्यलोकी आनंद ॥४६॥

श्रीरामप्रतापप्रौढी : रामनामाच्या निजगजरीं । नाद कोंदला अंबरीं । कैलासीं सत्यलोकवरी ।

---

**शब्दार्थ** - १. शुद्धीने, २. वायू, ३. गिरद्या, ४. टेकण, तक्त्या, ५. आत्मस्वरूपमय, ६. विवेचन, ७. देवांनी, ८. स्वप्रेमेकरून.

वैकुंठावरी नाद भरला ॥४७॥ ब्रह्मांडी नाद भरला पूर्ण । नादे भरलें आवरण। चालिले स्वानंदजीवन । अभिषेक पूर्ण तेणें केला ॥४८॥ श्रीराम स्वानंदाची मूर्ती । स्वानंदाभिषेक रघुपती । स्वानंदमय त्रिजगती । श्रीरघुपतिनिजराज्यें ॥४९॥ दुरात्मा अहंरावण। बंदीं घातले सुरगण । तो एकचि बाणें निर्दाळून । सुरगण सोडविले ॥५०॥ तेणें आनंदें पूर्ण भरित । श्रीरामाभिषेका त्वरित । विबुध आले धांवत । स्वस्थानीं रघुनाथ त्यांसी धाडी ॥५१॥ अहंरावणबंदींतून । रामें सोडविले सुरगण । स्वपदीं स्थापिले संपूर्ण । ऐका लक्षण तयाचें ॥५२॥ ब्रह्मा पूर्ण वेदपीठ । वेदीं स्वानंद यथेष्ट । रावणें हरोनियां स्पष्ट । शांतिपाठ नित्य पढवी ॥५३॥ स्वानंद हरितला रावणें । म्हणोनि लोलंगतें[1] झालीं ब्राह्मणें । करिती नीचाचीं याजनें[2]। पोट भरणें तरी नव्हे ॥५४॥ श्रेय देतां गायत्रीचें । तरी दुर्भर न भरे साचें। हेंचि रावण-बंदींचें । लागलें पिसें द्विजांसी ॥५५॥ बुद्धीच्या ठायीं ब्रह्मयाची वस्ती । रावणें त्याची बोधशक्ती । हरूनि केली अंधवृत्ती । बुद्धी आत्महितीं नाठवे ॥५६॥ सांडोनि चिदानंदस्फूर्ती । ब्रह्मा उपार्जी[3]लंकापती । स्वसुखत्यागें रावणाप्रती । नित्य पढती शांतिपाठ ॥५७॥ न मागतां देती आशीर्वचन । करिती नीचाचें सेवन। हाता यावया उपाध्येपण । द्वारीं संमार्जन यजमानाच्या ॥५८॥ तो निवटोनि दुर्बुद्धी । ब्रह्मा स्थापितां निजपदीं । नित्यानंदचिदानंदीं । नित्य समाधी पावला ॥५९॥ मनीं चंद्रम्याची वस्ती । नित्य असावें निर्विकल्पस्थितीं । तें हरितलें लंकाप्रती । चंचळवृत्ती तळमळी ॥६०॥ आपुले निजानंद अमृत । चंद्र भोगूं न शके मनांत । तुषार सेवी लंकानाथ । फळलें व्रत क्षयरोगी ॥६१॥ नित्यानंदपरिपूर्ण । पूर्णचंद्राचें लक्षण । तें हरितां दशानन । क्षयरोगें पूर्ण जन्ममृत्यु ॥६२॥ त्या निवटून लंकनाथा । चंद्र निजपदीं स्थापितां । मनीं बाणली उन्मनी[4] अवस्था। नित्यमुक्तता श्रीरामें ॥६३॥ अहंकारीं रुद्राची वस्ती । शिव कल्याण ज्यातें म्हणती । वचनें जड जीवां मुक्ती । पुराणें गर्जती आनंदवनीं ॥६४॥ तें हरितां लंकापती । क्षणें झाली विपरित वृत्ती । बुडाली निजानंदस्थिती । वाढली स्फूर्ति अहंदेहो ॥६५॥ निजात्मत्व विसरोनि कोडें । अहंदेहो हेंचि वाढे । विषयभोगीं हांव चढे । तंव तें उडे अहंभोगें ॥६६॥ कोटिवेळां विषयस्थिती । विविध भोग भोगिजती । कदा काळें नव्हे तृप्ती । न मनी निश्चितीं हे मिथ्या ॥६७॥ मागे मृगजळ प्राशना । हांव बांधे गगनसुमना । स्वप्नीचें षड्रस जाणा । मागे भोजना कांसवघृत ॥६८॥ ऐसें केलें लंकापतीं । त्यासी निवटोनि श्रीरघुपतीं । स्वयें स्थापिला निजस्थिती। झाली प्रतीती अहंआत्मा ॥६९॥ इंद्रयमादि कुबेर । रावणबंदीं समग्र । तळमळिती निरंतर । दुष्ट दशवक्त्रनिजसेवा ॥७०॥ सकळ भोग सकळ समृद्धी । नित्य वोळंगती सकळ सिद्धी । अपार वैभव इंद्रपदीं । बोलतां शब्दीं अनिर्वाच्य ॥७१॥ कल्पतरु चिंतामणी । कामधेनूचीं दुभणीं । तें सकळही विसरोनी । करी याचणी यागाची ॥७२॥ रावणाचें परिचारकपण[5] । बंदिपणें वोळगे जाण । विश्रांति नाहीं अर्धक्षण । नित्य वणवण शमेना ॥७३॥ तो निवटोनियां लंकापती । रामें सोडविला अमरपती । स्वपदीं स्थापितां निश्चितीं । पावला विश्रांती निजानंदें ॥७४॥ वायु पीडिला रावणें । मंद सुशीतळ अनुदिन । भोगी श्रम निवारणें । पुंडो झाडणे विषयांचे ॥७५॥ गदळल्या[6] बिदी राहतां । रावण दंडी सुबुद्धता । तो रामें वधोनि तत्वतां । निजमुक्तता वायूसी ॥७६॥ सोडविला प्रभंजन । तेणे झाला सुखसंपन्न। सेवावया रघुनंदन । आला शरण वेगिया ॥७७॥ शिवादिक सिद्ध पाहीं । अखंड राम त्यांचे हृदयीं । वायु जडोनि

शब्दार्थ - १. लोभी, २. यज्ञ करवणे, ३. आराधना करू लागला, ४. पाचवी अवस्था, ५. चाकरी, ६. केराने भरलेल्या.

तये ठायीं । श्रीरामपायीं विनटला ॥७८॥ स्वभावें प्राण अंगुळें बारा । निगमागमसंचारा । अखंड पिंडे नासिकाद्वारा । तेणें रघुवीरा सेविलें ॥७९॥ जडोन सिद्धांच्या हृदयीं । निर्गमागमसंचार[1] पाहीं । सांडोनियां लवलाहीं । श्रीरामापायीं सुस्थिर ॥८०॥ कुबेर संपन्न निजधनें । त्यासी दंडोनियां रावणें । कामग विमान नेलें तेणें । राखिला प्राणें बंधुत्वें ॥८१॥ त्या निवटोनि रावणासी । विमान देवोनि त्याचें त्यासी । स्वपदीं स्थापिलें धनदासी[2] । ख्याति ऐसी रामाची ॥८२॥ देवगुरु बृहस्पती । धरोनि आणिले लंकापतीं । उपन्यास[3] नित्य करिती । युक्तिप्रयुक्तिपर्यायें[4] ॥८३॥ न विचारितां काळाकाळ । युक्ति वाढवितां प्रबळ । रावण त्यासी दंडी सबळ । कां युक्तिजाळ बरळसी ॥८४॥ ब्रह्मांडीं श्रेष्ठ गुरूची युक्ती । ते न मानी लंकापती । विषयोन्मत्त झाली वृत्ती । अपमानिती गुरूसी ॥८५॥ तो निवटोनि अहंरावण । स्वपदीं देवगुरु[5] स्थापून । प्रकाशे देदीप्यमान । मान्य वचन त्रिलोकीं ॥८६॥ सकळ सिद्धींचा दाता । विघ्नहर रासभें[6] राखतां । विषयाभिलाषाचिया लाता । बहु सोशितां शिणला ॥८७॥ गणेशाची आत्मसिद्धी । रावणें हरिली त्रिशुद्धी । म्हणोनि श्रीरामें कृपानिधी । निजानंदी उद्धरिला ॥८८॥ आत्मसिद्धि हिरोनि पूर्ण । जीवें जीतां रावण । विषयरासभें राखवी पूर्ण । श्रम दारुण तेणें झाला ॥८९॥ जे जे काळीं इच्छा जैसी । ते ते पावतां वेगेंसीं । रावण त्यातें सुबुद्ध घुमसी । कासाविसी बहु तेणें ॥९०॥ चिंतामणि मोरेश्वरा । तुज आणिलें लंकापुरा । माझ्या नगरींच्या समग्रां । अपेक्षित वरां सिद्धि देईं ॥९१॥ ऐसें अहंरावणवचन । ऐकतांचि संकोचमन । बहुत पीडिला गजानन । विषयाभिलाषण करोनियां ॥९२॥ बाईल दग गा मोरया । बेल शेतालागोनियां । जात्यश्व[7] पैं बैसावया । लवलाह्या दे आम्हा ॥९३॥ आवारेभरी[8] असावे कण । कोट्यनुकोटी असंख्य धन । पुत्रपौत्रादि संतान । संतति गहन दे आम्हासीं ॥९४॥ ऐशा विषयलाता अद्भुत । तेणें पीडिला गणनाथ । तो निवटोनि लंकानाथ । शंकरसुत सोडविला ॥९५॥ देवोनियां निजात्मसिद्धी । स्वयें स्थापिली निजपदीं । तेणें प्रकाशली आत्मबुद्धी । निजानंदीं जग निववी ॥९६॥ काळ आतुडला रावणासी । त्रिकाळ वोळंगत समयासी । काळांतरींच्या कर्मासी । अकाळेसीं करीतसे ॥९७॥ प्रत्यवायाचें[9] भय नाहीं । दोषा दंडितां यम पाहीं । तराळ झाली त्याच्या ठायीं । दंड तो कायी कोणासी ॥९८॥ काळाचा काळ तो रघुनाथ । काळें वधोनि लंकानाथ । काळ सोडविला त्वरित । सुखें वर्तत यथाकाळें ॥९९॥ यम नियंता सकळ जगा । कर्मभोगें दंडी पैं जगा । त्यासी रावण दंडी वेगा । वाहवी टोणगा जीवन ॥१००॥ तुटतां विषयांचें जीवन । यमासी दंडी क्षणक्षण । तो निवटोनियां रावण । धर्मसंस्थापन निजपदीं ॥१॥ रावणबंदीं अग्नि पूर्ण । स्वप्रकाशतेज आच्छादून । मळ धूतसे आपण । रजरागें पूर्ण कवळिजे ॥२॥ रावणवनिता कामें उन्मत्त । पक्षपक्षा रजा स्रवत । तितुकें अग्नि शुद्ध करित । डाग फेडित काटाचे[10] ॥३॥ अल्प डाग राहतां । सोटे वाजती अग्नीचे माथां । त्या निवटोनि लंकानाथा । अग्नि तत्वतां सोडविला ॥४॥ देखोनियां निजतेजदीप्तीं । अग्नि स्थापिला स्वपदाप्रती । बाप कृपाळु रघुपती । बंदिमुक्ती सुरवरां ॥५॥ रावणबंदीं असतां वरुण । सेवा करी अनुदिन । विषप्राय विषय पूर्ण । सुरस करोन त्यास पुरवी ॥६॥ वरुण रसांचा अधिष्ठाता[11] । रावण उन्मत्त भोगीं असतां । जो जो रस आवडे चित्ता । तो न पावतां दंडिजे ॥७॥ त्यासी निवटोनि रघुनाथें । निजपदीं वरुणातें । तृप्ति करोनियां परमामृतें । निजनिश्चितें

---

शब्दार्थ - १. आतबाहेर जाण्यायेण्याची क्रिया, २. कुबेराला, ३. प्रवचन, ४. युक्तायुक्त गोष्टी सांगून, ५. बृहस्पती, ६. गाढवे, ७. जातिवंत घोडा, ८. कोठारात परिपूर्ण, ९. अडथळ्याचे, १०. दोषाचे, ११. आश्रयस्थान.

स्थापिलें ॥८॥ काम भुलवी चराचरां । तो आतुडला दशवक्त्रा । वेगें करोनि कामारां[1]। निजसेजारा झाडवी ॥९॥ विविध भोग भोगिजेती । सर्वेचि क्षणें सरोनि जाती । कदाकाळें नव्हे तृप्ती । वणवण चित्तीं निजबंदी ॥११०॥ रामें निवटोनि रावण । कामा निष्कामीं स्थापन । स्वयें करोनि आपण । सावधान पावविला ॥११॥ वसंत रावणकारागृहीं । नित्य नूतन वन शृंगारी । पुष्पें फळें कामाचारी । न पावतां भारी दंडिजे ॥१२॥ त्याचें करोनि निःसंतान । निजानंदें करोनि पूर्ण । निजपदीं संस्थापून । केला सुखसंपन्न वसंत ॥१३॥ तेणें हरिखें दोघेही जण । सेवावया रघुनंदन । काम वसंत आपण । अयोध्याभुवन वसविलें ॥१४॥ श्रीरामभक्त नित्य निष्काम । त्यासी अनुसरोनिं काम । सेवावया रघुत्तम । भजनधर्म वाढवित ॥१५॥ विषयकर्दमीं शिणला । तृप्ति न पवेचि वहिला । श्रीरामभक्तांसी विनटला । सुख पावला श्रीरामें ॥१६॥ श्रीराम नित्यानंदें निर्दोष । क्रियामात्र न रिघे देख । भक्त झाले तदात्मक । रघुकुळटिळकनिजभजनें ॥१७॥ तेथें कामें नवलपरी । रिघोनि भक्तांचे अंतरीं । भजन करित नानापरी । निजनिर्धारीं परियेसीं ॥१८॥ अनावरा आवरित । अमूर्ताची मूर्ति घडित । अगोचरातें पाहत । संभावित असंभाव्या ॥१९॥ अचिंत्याचें नित्य चिंतन । अध्येयाचें नित्य ध्यान । अनाम्याचें नामकीर्तन । गुणवर्णन अगुणाचें ॥१२०॥ अनर्च्यातें नित्य अर्चित । चिदंबरा पांघरवित । सर्वालंकारा अलंकारित । संभावित असंभाव्या ॥२१॥ चित्सच्चिदासी ओंवाळणी । सर्वगंगळा मंगलश्रेणी[2] । विचित्र पूजाच्या भरणीं । प्रीति करोनि अर्पित ॥२२॥ संतोषावया श्रीराघव । ऐसा कामें योजिला भाव । तंव वर्तलें अपूर्व । निजलाघव रामाचें ॥२३॥ सेवा करितां पैं हरिखें । म्हणे उतराई कवतुकें । कांही झालों यथासुखें । तंव आपुलें देखे मूर्खत्व ॥२४॥ जेथें मनाची नखी[3] नलगे । चित्त चिंतितां दाटीं उबगे । बुद्धि बोधामार्गे रिघे । अहं उगे थोटावे ॥२५॥ रिघता इंद्रियां सांकडें । तेथेही म्यां निजानंदमूढें । अखंडाचीं करोनि खंडें । पूजाबंडें वाढविलीं ॥२६॥ ऐसी निजकर्माची खंती । कामें मानोनियां चित्तीं । स्वयें पावोनियां उपरती । विरे रघुपतीमाझारीं ॥२७॥ लंकाबंदींचा वसंत । रामे सोडविला त्वरित । सेवावया रघुनाथ । आला धांवत अयोध्येसी ॥२८॥ श्रीरामाराम मूर्तु । वसंत पावला तेथु । एके काळें सकळ ऋतु । आले त्वरित पूर्वीच ॥२९॥ नीरसें वोळलीं रसभारें । उलोनि स्रवती रसधारे । सकळ सारांचे निजसार । गोडी अपार अनिर्वाच्य[4] ॥१३०॥ केवळ शुष्क निरंकुरें । ते पाल्हेजती भजनांकुरें । लसलसीत प्रेमभरें । मनोहरें देखतां ॥३१॥ श्रीरामआवडीचें फळ । जन्मांतरीं नेणती अबळ । तींही फुलों आलीं सकळ । आमोद बहळ प्रेमाचा ॥३२॥ श्रीरामभजनाचें फळ । कल्पांती नेणती अबळ । श्रीरामागमनें पैं सकळ । अफळ ते सफळ होवोनि ठेले ॥३३॥ धर्म अर्थ कामसेवा प्रबळ । चौथें मोक्ष फळ केवळ । तें निवटूनियां सकळ । आनंदफळ रामराज्यें ॥३४॥ बंधमोक्षातीत । श्रीरामफळ सेवितां भक्त । चहूं फळांसी विटावित । वांकुल्या दावित सुरसिद्धां ॥३५॥ ऐसें देखोनियां वसंता । लाज आली निजव्रता । तेथें मी काय सेवा करिता । जडला तत्वतां चरणकमळीं ॥३६॥ ऐसे कामवसंतादि जाण । सकळ सुरवर आपण । श्रीरामराज्यसुखसंपन्न । श्रीरामें पूर्ण गौरविले ॥३७॥ वस्त्रें भूषणें परिकर । देवोनियां सुंदर । रामें गौरविले समग्र । धाडी समग्र निजपदा ॥३८॥ तेथें मिळोनियां सुरमादी । विचार करिती निजात्मबुद्धीं । आम्हीं गौरविलें

---

शब्दार्थ - १. दास, सेवक, २. कल्याणकर गोष्टींचा समुदाय, ३. स्पर्श, ४. बोलता न येणारी.

निजपदीं । परी शेष नेदी श्रीराम ॥३९॥ श्रीरामशेष न येतां हाता । स्वपद न राहे सर्वथा। क्षणें जाईल विकल्पता[1] । होय विचारिता पैं ब्रह्मा ॥१४०॥ भक्ता गौरविलें रघुपतीं । शेष देईल तयांप्रती । युक्ति साधूं त्याचिया पाती[2] । प्रजापतीं नेमिलें ॥४१॥ घ्यावया स्वामीचे शेष। एक अंगवला[3] सेवक । कां लडिवाळ बाळक । अंकस्थ[4] देख धाकुटें ॥४२॥ या बुद्धी चतुरानन । भक्तांमार्जी रिघोनि जाण । श्रीरामशेषालागून । स्वयें विंदान साधिलें ॥४३॥ भरत शत्रुघ्न बिभीषण । सुग्रीव अंगद वायुनंदन । जांबवंतादि वानरगण । गौरव पूर्ण पाहूं यांचा ॥४४॥

**शत्रुघ्नाला सेनापती करावे अशी भरताची रामांना प्रार्थना :** भरत पुढें होवोनि जाण । घालोनियां लोटांगण । विनविला रघुनंदन । स्वामी विनवण परिसावी ॥४५॥ राउळें[5] केलें वनाभिगमन । तेंचि मज व्रतग्रहण । तुमचें राज्यपरिपाळण । शत्रुघ्नें आपण स्वयें केलें ॥४६॥ निद्रालस्य सांडोनि दूरी । रामभजनीं प्रीति भारी । सत्सेवेसी निरंतरीं । सांडणें करी जीवित्वाचें ॥४७॥ राज्यलोभ नातळे चित्ता । सत्संगति रामकथा । शत्रुघ्नासी उल्लास चित्ता । अतिसावधता उभयार्थी ॥४८॥ नित्य यौवराज्यपालन । तेणें माझें राखे मन । स्वहितार्थी कुशल पूर्ण । सावधान सेवेसीं ॥४९॥ श्रीरामआज्ञेनें राज्यशासन । तें श्रीरामाचें भजन । ऐसा निश्चय मानोनी पूर्ण । सावधान सेवेसीं ॥१५०॥ सर्वकाळ सर्वावस्थीं । स्मरे शत्रुघ्न रघुपती । कर्माकर्माच्या निश्चितीं । चित्तवृत्ति भेदेना ॥५१॥ स्वामी आलिया निजराज्यासी । अति उल्हास शत्रुघ्नासी । अति कुशळ भजनासी । करावें यासी सेनानी ॥५२॥ ऐशी ऐकोनि भरतवाणी । राम संतोषला मनीं । हृदयीं धरिला आलिंगोनी । होतें मनीं तेंचि झालें ॥५३॥ श्रीरामाचें मनोगत । युवराजा पैं भरत । शत्रुघ्न सेनानी निश्चित । आणि सुमंत प्रधान ॥५४॥ तेंचि भरतें सांगितले । सकळांचे मनास आलें । वसिष्ठेंहि आज्ञापिलें । भरतबोलें वर्तावें ॥५५॥

**सर्वांच्या इच्छेप्रमाणे रामांनी शत्रुघ्नाला सेनापती व सुमंताला प्रधान केले :** सकळांचीं मनोगतें । सेनानीपण शत्रुघ्नातें । प्रधानत्व सुमंतातें । श्रीरघुनाथें अभिषेकिलें ॥५६॥ जैसी भरताची पूजा । तैसिया रीती पूजिलें वोजा । बाप कृपाळु रघुराजा । निजगणां वोजा पूजित ॥५७॥ सात शतें निजमाता । रामें गैरविल्या समस्ता । कैकेयी कौसल्या सुमित्रा । समानता गौरविल्या ॥५८॥ सकळ सैन्य अति प्रीतीसीं। आदिकरोनि दासदासी । गौरवितां निजमानसीं । श्रीरामासी आल्हाद ॥५९॥ आनंद श्रीरघुनाथा । निजदासांतें पूजितां । आश्चर्य सुरवरां समस्ता । वर्षती माथां सुमनभार ॥१६०॥ भरतादि बंधु जाण । सुमंतादि सकळ प्रधान । दीन जे कां अकिंचन । रामें संपूर्ण गौरविले ॥६१॥ एका जनार्दना शरण । झाली सकळांची गौरवण । सुग्रीव आणि बिभीषण । कपिसैन्य विसरला ॥६२॥ ऐसें न मानावें श्रोतां । राम न विसरे सर्वथा । निजभक्तांची पूजा करितां । उल्हास चित्ता रामाच्या ॥६३॥ तें अति गोड निरूपण । सकळ तृप्तीचें कारण । भोजनीं जेंवी दध्योदन[6]। तेंवी पूजन भक्तांचें ॥६४॥ भक्तांमाजी मुखरी[8] । हनुमंताची प्रीति थोरी । त्याच्या पूजनाची आवडी भारी । प्रीति रघुवीरीं अतिशय ॥६५॥ अति गोड निरूपण । देवां भक्तां प्रेम पूर्ण । एका जनार्दना शरण । जगदुद्धरण रामकथा ॥१६६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां भरताभिषेको नाम षडशीतितमोऽध्यायः ॥८६॥ ओंव्या ॥१६६॥ श्लोक ॥२॥ एवं ॥१६८॥

---

शब्दार्थ - १. संशयाने, २. पंक्तीला, ३. पात्र झाला, ४. मांडीवर बसलेले, ५. देवाने, ६. दहीभात, ८. मुख्य श्रेष्ठ.

# अध्याय सत्याऐंशींवा

॥ श्रीसद्‌गुरुरामचंद्राय नमः ॥

## हनुमंताचे लीलाचरित्र

**श्रीरामांकडून सर्वांचा सन्मान :** ब्रह्मादि लोकपाळांसी । रामें गौरविलें सकळांसी । पुढें बिभीषण सुग्रीवादिकांसी । राम निजगणांसी पूजित ॥१॥ निजगणांची प्रीति पूर्ण । आवडीं त्याचें पूजाविधान । स्वयें करीत रघुनंदन । ऐका विवंचन तयाचें ॥२॥ देवभक्तांचें प्रेम गहन । त्यांचें पूजेचें विधान । वदावया मज कैचें वदन । हीन दीन मतिमंद ॥३॥ तथापि श्रीरामकृपेची ख्याती । वनचर मर्कट हातीं । धरोनियां अपांपती । बांधिला निश्चितीं पाषाणीं ॥४॥ निरायुधें माकडें । तीं पाडिती लंकेचे हुडे[1] । दशमुख केलें वेडें । घेतलें कैवाडें[2] त्रिकूट क्षणें ॥५॥ सागरीं दगड तरती । पालेखाईर सुरकार्यार्थी । तिहीं राक्षय नेले भस्मांतीं । त्रिजगतीं उत्सावो ॥६॥ तोचि मजलागीं कळवळोन । अवतरला एका जनार्दन । दुर्लभ जें रामायण । तें सुगम करोन दाविलें ॥७॥ अति सूक्ष्म भावार्थ । अति गुह्य जो सिद्धांत । करतळामळकवत[3] । कृपान्वित दाविला ॥८॥ बाळकाची अति प्रीती । माउली शौचाशौच न विचारिती । प्रेम उचलोनि खांदीं घेती । मळ क्षाळिती निजकरीं ॥९॥ परी तेथेंही एक नवल । जननीजनकें धुतलें मळ । तें पुनरपि होय कश्मळ[4] । सज्जनांचे करकमळ । सबाह्य मळ क्षाळित ॥१०॥ सज्जनांचा हात माथां । पडतां झाली पवित्रता । ब्रह्मादिक निजमाथां । वंदिती तत्वतां पूज्यत्वें ॥११॥ भावार्थे धरितां सत्संगती । कोण अर्थाची अप्राप्ती । सर्वथा नुरे निश्चितीं । दृष्टी वोळंगती सकळार्थ ॥१२॥ असो आतां कवितार्थ । झणें कोपतील संत । सांडोनियां निजकार्यार्थ । स्तुतिवादार्था काय काज ॥१३॥ ऐका स्वामी सावधान । तुम्हांसी न साहे स्तवन । तरी माझें लोटांगण । रामकथन अवधारा ॥१४॥

**सुग्रीवाचा सत्कार :** सुग्रीव जो कां वानरनाथ । बिभीषण लंकानाथ । प्रीतीं बोलावोनि रघुनाथ । पूजा करित निजप्रेमें ॥१५॥ वस्त्रें भूषणें अलंकार । चिद्रत्नांचे मनोहर । ब्रह्मदत्त माळा परिकर । बाणली सत्वर बिभीषणा ॥१६॥ येरें घातलें लोटांगण । श्रीरामें धरिला आलिंगून । आनंद उथळला पूर्ण । रघुनंदननिजकृपा ॥१७॥ तैसीच सुग्रीवाची पूजा । श्रीरामें केली अति वोजा । बाप कृपाळु रघुराजा । निजगणफौजा गौरवित ॥१८॥ ब्रह्मयाचा पणतू बिभीषण । ब्रह्मदत्त माळा जाण । त्यासी अर्पी रघुनंदन । चतुरानन[5] सुखमय ॥१९॥ सुग्रीव सूर्याचा पुत्र । सूर्यदत्त विचित्र हार । स्वयें अर्पितां रघुवीर । तेणें दिनकर सुखमय ॥२०॥

अर्करश्मिप्रतीकाशां कांचनीं मणिभूषिताम् । सुग्रीवाय स्रजं दिव्यां प्रायच्छद्रघुपुंगवः ॥१॥

सूर्यप्रकाशाची घडली । विचित्र रत्नीं परिवारिली । हेममणींमाजी ओविली । तेणें माळ शोभली अनुपम्य ॥२१॥ वस्त्रें भूषणें परिकर । चिद्रत्नें तेजाकार । रामें पूजिला सुग्रीव वीर । सूर्यदत्त हार देवोनि ॥२२॥ तेणें सुग्रीव शोभला । ब्रह्मादिकांपरीस वहिला । श्रीरामें प्रीतीं आलिंगिला । निमग्न झाला निजानंदीं ॥२३॥ तैसेच इतर वानरवीर । पूजिता झाला रामचंद्र । वस्त्रें भूषणें अति परिकर । आश्वासन पैं केलें ॥२४॥ कंगळटोप[6] राघावळी[7] । रामें लेवविले गोळांगूळीं । सुरसिद्ध विस्मित सकळी । नावरदळीं अति शोभा ॥२५॥ ते पुसाल

---

शब्दार्थ - १. बुरुज, २. युक्तीने, ३. हातावरच्या आवळ्याप्रमाणे, ४. मलिन, ५. ब्रह्मदेव, ६. शिरस्त्राणे, ७. जाळीदार कपडे.

कोण म्हणोन । तितके सांगों शके कोण । संक्षेपें नांवे सांगेन। कृपा करून परिसावें ॥२६॥

ततो द्विविदनीलाभ्यां भूषणानि परंतपः । सर्वान्वानरमुख्यांश्च प्रददौ वसुधाधिपः ॥२॥

सर्वे वानरवृद्धाश्च ये चान्ये वानरोत्तमाः । वासांसि भूषणैश्चैव यथार्हं प्रतिपूजिताः ॥३॥

सर्व वानरप्रमुखांचा सत्कार : नळ नीळ जांबवंत । मैंद द्विविद विख्यात । सुषेणदधिमुखादि तेथ । वानर समस्त गौरविले ॥२७॥ लहान थोर वृद्ध बाळ । पुरुषार्थी[1] रणशार्दूळ । सर्वस्वेंसीं रघुकुळपाळ । निजांगें अढळ सेविला ॥२८॥ विचित्र भूषणें विचित्र माळा । विचित्र वस्त्रें विचित्र लीळा । रामे पूजिला वानरपाळा । सुरां सकळां देखतां ॥२९॥ सर्वस्वेंसी भजलेति मातें । तुमचा ऋणी मी निश्चितें । काय उत्तीर्ण[2] होऊं मी येथें । कांहीं वरातें अंगीकारा ॥३०॥ कोणेहि काळीं निश्चित । हीन दीन नव्हे चित्त । सदा पूर्ण मनोरथ । नित्य तृप्त सर्वदा ॥३१॥ जेथें असती वानरवीर । सुपक्व फळें निर्झरनीर । सांद्र[3] पल्लव कोमलांकुर । सुखनिर्भर सर्वदा ॥३२॥ संभाविलें[4] पैं सकळांसी । अंगद आणि हनुमंतासी । राम विसरला मानसीं । झणें चित्तासी मानाल ॥३३॥ तया दोघांचें पूजन । अति प्रेमाचें कारण । सुखातीत सुख जोडे पूर्ण । समाधान जीवशिवां ॥३४ ॥

हनुमंत व अंगदाच्या पूजेविषयी श्रीराम सर्व वानरांना प्रश्न करतात : गौरवोनियां सकळांसी । राम पुसे अति प्रीतीसीं । कांही उत्कंठा मानसीं । सकळांपासीं मागतसे ॥३५॥ अंगद हनुमंत दोघे जण । यांचे करावें पूजन । यांच्या उपकारा जाण । ऋणी संपूर्ण आहें मी ॥३६॥ याकारणें या दोघांसी । अंकीं बैसवावें अति प्रीतींसीं । तेणें उत्तीर्ण कांही यांसी । निजमानसीं वाटेल ॥३७॥ तुम्हां सकळांचे आज्ञापन । जरी होईल कृपेंकरून । तरी मी ऐसेंचि करीन । सुखसंपन्न जरी तुम्ही ॥३८॥

वानरांकडून हनुमंताची प्रशंसा : श्रीरामाचें निजवचन । ऐकतांच सकळ जन । होवोनियां सुखसंपन्न । लोटांगण घालिती ॥३९॥ हनुमंताचेनि धर्में पूर्ण । आम्हां स्वामी रघुनंदन । रामें पावन वानरगण । ख्याति पावन त्रिलोकीं ॥४०॥ वाळीचे भेणें पळतां । कोठें नाहीं विश्रांतता । हनुमान भेटोनि रघुनाथा । निर्भयता केली आम्हां ॥४१॥ देवां वाळी दैत्यां वाळी । असुरां सुरदानवां वाळी । रावण ज्यातें कांपे चळीं । तेणें होळी केली त्याची ॥४२॥ क्षणें वधुनियां वाळीसी। दुःख निरसोनि स्त्रीपुत्रांसी । भेटविलें ऐक्यतेसीं । निजराज्यासी देवोनी ॥४३॥ सीताशुद्धीची दुर्घट कथा । समुद्रउल्लंघनाची वार्ता । लंका जाळोनि तत्वतां । लंकानाथा गांजिलें ॥४४॥ पुत्र प्रधान समग्र । मारोनियां वीरें वीर । हनुमान अंगद झुंजार । सीता सुंदर संबोखिली[5] ॥४५॥ सीता शुद्धि पैं आणून । अंगद विजयी केला पूर्ण । प्रीति मानी रघुनंदन । यासी कारण हनुमंत ॥४६॥ हनुमंतें अंगदाची कीर्ती । हनुमंतें अंगदाची ख्याती । हनुमंते आम्ही रामीं सरतीं[6] । बहुत किती अनुवादों ॥४७॥ आम्हांसी स्थिति गति हनुमंतें । आम्ही जीवंत वायुसुतें । पावन वनचरें समस्त । कीर्तिमंतें त्रिलोकीं ॥४८॥ आम्हां गति मति शरण । स्वामी जो कां रघुनंदन । हनुमंताच्या धर्में जाण । सद्गुरु जाण हनुमंत ॥४९॥ ज्याचेनि पाविजे रघुपती । ज्याचेनि त्रैलोक्यांत ख्याती । त्याचे पूजेचें विषम चिंती । तो आत्मघाती निश्चित ॥५०॥

अंगदाची स्तुती : अंगद आम्हां निजजीवन । अंगद आम्हां निजप्राण । अंगदें सकळिक पावन । आम्ही धन्य अंगदें ॥५१॥ कुळींचा पैं भलता कोणी । जरी विनटे[7] रामचरणीं । पतित पितर यमयातनीं । तें त्याचेनि पैं सुटती ॥५२॥ अंगद आवडता श्रीरामीं । त्याचेनि

---

शब्दार्थ – १. पराक्रमी, २. उतराई, ३. दाट, ४. सत्कारिले, ५. समाधान दिले, ६. आवडती, ७. तप्तर होतो.

पावन सकळ आम्ही । त्याची पूजा करिता स्वामी । सुखसुंगमीं संतुष्ट ॥५३॥ सुग्रीवादि सकळ जन । निजहरिखें रघुनंदन । विनवितांचि आनंदमग्न । भक्तपूजन करी राम ॥५४॥ हनुमंताचा परम आप्त । भक्त अनुरक्त विख्यात । अंगद वीर परम दैवत । बैसवी रघुनाथ दक्षिणांकीं ॥५५॥

सीतने रामांची डावी मांडी मारुतीसाठी सोडली, अंगद मारुती यांना दोन बाजूस बसवून त्यांची पूजा : ते देखोनि जनकदुहिता । जाणोनि स्वामीच्या मनोगता । रामांक सांडोनि सीता । तळीं तत्वतां उतरली ॥५६॥ बैसावया हनुमंता । ठाव दिधला जनकदुहिता । तेणें आनंद रघुनाथा । अंकीं तत्वतां बैसविला ॥५७॥ दोघे आलिंगोनि प्रीतीं । अंकीं बैसवितां रघुपती । आनंदल्या सुरपंक्ती । कपिपती आनंद ॥५८॥ वस्त्रें भूषणें परिकर । चिद्रत्नांचे अलंकार । निजहस्तें रघुवीर । दोघे वीर गौरविले ॥५९॥ अंगद हनुमंताचा शिष्य । त्याचे पूजेचा संतोष । अतिशयें हनुमंतास । हे राघवेश जाणतसे ॥६०॥

रामांनी कुबेराने दिलेली माळ अंगदाच्या गळ्यात घातली : कुबेरदत्त रत्नमाळा । अतिशयेंसीं सुढाळा[1] । अति प्रीतीं घननीळा । घाली गळां अंगदाच्या ॥६१॥

वैदूर्यमणिसंबद्धे वररत्नपरिष्कृते । प्रायच्छद्धालिपुत्राय चांगदायांगदे विभुः ॥४॥

वैडूर्यादि विचित्र रत्नें । मध्ये मध्ये मणिकांचनें । प्रभा फांकतसे गगनें । सविता तेणें लाजिला ॥६२॥ निजबाहूंचीं वीरकंकणें । प्रीती करोनि रघुनंदनें । दिधलीं अंगदाकारणें । शोभे तेणें अनुपम्य ॥६३॥ करीं कंकणें बाणलीं । कंठीं माळा पैं घातली । श्रीरामअंकावरी भली । शोभा आली अंगदा ॥६४॥ तैसीचि हनुम्याची पूजा । रामें केली अति वोजा । बाप कृपाळू रघुराजा । भक्त फौजा गौरवित ॥६५॥ तें देखोनि जानकीसी । प्रीती दाटली मानसीं । पूजावया हनुमंतासी । अति प्रीतींसीं विचारी ॥६६॥ रत्नमाळा वायुदत्ता । रामें पूजिली जनकदुहिता । तिणें पूजावया हनुमंता । आज्ञा इच्छित रामाची ॥६७॥

अवमुच्यात्मनः कंठाद्धारं जनकनंदिनी । वानरान्प्रेक्ष्य तान्सर्वान्भर्तारं च पुनः पुनः ॥५॥
तामिंगितज्ञः संप्रेक्ष्य बभाषे जनकात्मजाम् । ददस्व सुभगे हारं यस्य तुष्टासि भामिनि ॥६॥
एवमुक्ता तु वैदेही राघवेण महात्मना । प्रददौ वायुपुत्राय तं हारमसितेक्षणा ॥७॥

सीतेने रामांच्या अनुज्ञेने तिच्या गळ्यातील हार मारुतीच्या कंठात घातला. त्यामुळे सर्वांना आनंद : कंठींचा काढोनि हार । हातीं घेवोनि वेगवत्तर । चंद्रवदना मृगनेत्र । पाहे वक्त्र रामाचें ॥६८॥ सीता मर्यादेची राशी । उच्छृंखळता नाहीं तिसी । सुरवानरसभेसीं । कैंवी रामासी पुसावें ॥६९॥ अंतरात्मा रघुनंदन । चिन्ह तियेचें जाणोन । निजकृपा कळवळोन । काय आपण बोलत ॥७०॥ हार काढोनियां हातीं । तुवा घेतला अति प्रीतीं । कोणावरी तुझी स्नेहस्थिती । त्यासी निश्चितीं अर्पावा ॥७१॥ शंका न धरावी मानसीं । हार अर्पी आवडे त्यासी । ऐकोनि रामाज्ञेसीं । निजमानसीं हरिखेली[2] ॥७२॥ प्रीतीं उचलोनियां माळा । घाली हनुमंताचिया गळां । तैं आनंद सुरा सकळां । घनसांवळा सुखमय ॥७३॥ जानकी अति प्रीतीसीं । माळ देतां हनुमंतासी । आनंद झाला श्रीरामःसी । पुष्पवृष्टीसी सुर करिती ॥७४॥

या घटनेमुळे हनुमंत दुःखित : तें जाणोनि वायुनंदन । झाला अत्यंत उद्विग्न । बाह्यपूजा तें मज विघ्न । अभिमान जनघातकी ॥७५॥ ऐसें विचारोनि पूर्ण । आदरिलें वानरचिन्ह । तेणें विस्मित सुरगण । रघुनंदन विस्मित ॥७६॥ ऐसें साधोनि विंदान । वेगें उडाला आपण । वृक्षीं बैसला

शब्दार्थ - १. अती तेजस्वी, २. हर्ष पावली.

वंळघोन । मर्कटचिन्ह निजचेष्टा ॥७७॥ मर्कटचेष्टा वाडेंकोडें । डोळे घुलकावी सीतेकडे । वाकुल्या दावी सौमित्राकडे । नाचे उडे तडतडा ॥७८॥

मारुतीने माळेंतील एक एक मणी तोडून टाकला : माळ काढोनि झडकरी । रत्नें तोडित तडकरी । वेगें घालोनि मुखाभीतरीं । टाकी दुरी चावोनी ॥७९॥ तें तंव लागे अति कठिण । चावितां नये संपूर्ण । आणिक पाहे तोडून । तंव तेहीं जाण तैसेंचि ॥८०॥ देखोनि हनुमंताचें चिन्ह । आवेशले वानरगण । करूं आदरिलें त्राण । तंव अश्वगण पैं उडती ॥८१॥ डहाळे धरोनि वृक्षांसीं । झोंबूं धांवतीं फळासी । घोडी गोविलें वानरांसी । हात फळासी पावेना ॥८२॥ तेणें क्रोध वानरांसी । खांवो न लाहों फळांसी । घोडीं गोविलें आम्हांसी । धरोनि पुच्छीं झुगारिती ॥८३॥ करितां उलटें किराण । अत्यंत तडतडी अंगत्राण[१] । मग तोडतोडों जाण । वानरगण टाकिती ॥८४॥ बरें गौरविलें रघुनंदनें । गोवोनि सांडिलीं वानरगणें । करूं न लाहती किराणें । फळ खाणें अंतरलें ॥८५॥ या अंगत्राणा पैं हातीं । हाली चाली खुंटली गती । कायसा कृपाळु रघुपती । वानरपंक्ती खिळलिया ॥८६॥ पायीं घोडीं बेडी जोडली । उड्डाणाची गति खुंटली । भलीं गौरविलीं रघुनाथें ॥८७॥ तेणें अंगें अंगत्राणें खिळिलीं । उड्डाणाची गति खुंटली । भलीं गौरविलीं रघुनाथें ॥८७॥ तेणें अंगें अंगत्राणें खिळिलीं । वसिष्ठादि ऋषिजन । सुमंतादिक प्रधान । अट्टाहास्यें पूर्ण हांसती ॥८८॥ हांसती सुरगण । वसिष्ठादि ऋषिजन । सुमंतादिक प्रधान । अट्टाहास्यें पूर्ण हांसती ॥८८॥ अंगद सुग्रीव बिभीषण । हांसते झाले गदगदोन । मुखीं पालव धरोन । रघुनंदन हांसत ॥८९॥ जंव जंव सकळही हांसती । तंव तंव वानर अधिकें उडती । चेष्टा करीत अपरिमिती । विटाऊं लागती सुरसिद्धां ॥९०॥

पृथ्वीमोलाची रत्ने फोडल्याबद्दल मारुतीला लक्ष्मणाचा प्रश्न : तें देखोनि अनुचरित । सौमित्र आदरें पूसत । सकळां अग्रणी हनुमान भक्त । काय अद्भुत मांडिलें ॥९१॥ श्रीरामभजनप्रीतीसीं । तुझी दीक्षा सकळांसी । राम ऋणी तुझिया भजनासी । उत्तीर्णता त्यासी दिसेना ॥९२॥ यालागीं श्री रघुपती । अंकी बैसवोनि अति प्रीतीं । आदरें तुझी पूजा करिती । ते तुझ्या चित्तीं मानेना ॥९३॥ एक एक रत्नासी । द्वीपांतरींचें मोल परियेसीं । उपायनें श्रीरामासीं । अति प्रीतीसी आणिलीं ॥९४॥ तेणेंकरीं तुझें पूजन । स्वयें करीत रघुनंदन । तेंही न माने तुजलागून । हें अंतर गहन कळेना ॥९५॥ अंगीकारोनि वानरवृत्त । स्वयें दाविसी अनुचरित । रत्नें तोडतोडूं टाकित । आणि उपमत[२] द्रुमशिखरीं ॥९६॥ याचा काय अभिप्राय । राउळें[३] सांगावा स्वयमेव । पुसतसे बंधु राव । महाबाहो हनुमंत ॥९७॥ ऐकोनि सौमित्रवचन । मर्कटचेष्टा अंगीकारून । विटावण दाखवून । बोले वचन तें ऐका ॥९८॥

हनुमंताचे मार्मिक उत्तर : आम्ही मर्कट वनचरें । अंकीं बैसविलें प्रेमें थोरें । जेणेंकरोनि पोट भरे । ऐसें आदरें देईल ॥९९॥ ऐसी धरोनि थोर आस । अंकीं बैसलों सावकाश । तंव ते झाली निराश । अंतर राघवेश जाणेना ॥१००॥ अंतरीं तळमळ गहन । बाह्य पूजेचें कार्य कोण । अंतर तृप्त न होतां पूर्ण । विटंबन बाह्यपूजा ॥१॥ चुकवोनियां निजमुखासी । क्षीरलेप देतां सर्वांगासी । नव्हे क्षुधानिवारणासी । तळमळ कैसी जाईल ॥२॥ अंतरीं न विझेचि तळमळ । वरी गोड गाणीं प्रबळ । गात्रें जाती विकळ । कृपाकळवळ ते ऐशी ॥३॥ टक पडिलें सुरसिद्धांसीं । टक पडिलें नरवानरांसी । अंकीं बैसवोनि हनुम्यासी । श्रीराम त्यासी काय देईल ॥४॥ तंव गौरविलें रघुनाथें । वरिवरी अंलकारीं बहुतें । अंतर अवघें तैसेंचि रितें ।

---

शब्दार्थ - १. कवच, चिलखत, २. उड्या मारीत, ३. त्वां समर्थाने.

जेंवी कां प्रेतें कानड्यांचीं ॥५॥ मांडी घालोनि प्रेतातें । अलंकारिती प्रेमें बहुतें । तैसेंचि केलें रघुनाथें । बाह्य आमुतें पूजोनी ॥६॥ श्रीरामाचें कृपादान । दगडाहुनि अति कठिण । खातां पडतील दशन[1] । क्षुधाहरण तेथें कैचें ॥७॥ रत्नें सुढाळें[2] दिसती । खातां बहु गोड असती । म्हणोनि तोडोनियां प्रीतीं । मुखाप्रती घातलीं ॥८॥

ज्यांच्यात 'राम' नाही ती रत्ने मला दगडासारखी आहेत म्हणून मी ती फोडली असे मारुतीने सांगितले : फोडोनि पाहिलें एकएक । तंव तीं अवघीं तैसींच देख । मग म्यां सांडिलीं निःशेख । मर्कटवेशें साचार ॥९॥

रामरत्नमहं वंदे कौसल्याकुक्षिसंभवम् । जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमंडितम् ॥८॥

तुमचीं अनर्घ्य रत्नें स्वामी । त्यातें दगड मानूं आम्ही । हे अति उच्छृंखळता दुर्गमी । क्षमा तुम्हीं करावी ॥११०॥ ऐकतां हनुम्याचें उत्तर । सौमित्र झाला विस्मयपर । कांही न देववे प्रत्युत्तर । सकळ सुर तटस्थ ॥११॥ यक्ष किन्नर गंधर्वगण । सिद्ध चारण मुनिजन । ब्रह्मादिक सुरगण । आश्चर्यें पूर्ण हांसती ॥१२॥

इतर वानरांचा हैदोस : देखोनि हनुम्याची चर्या । सकळ वानरीं तेचि क्रिया । अश्व झुगारिती पुच्छीं धरूनियां । त्राणें[3] तोडोनियां सांडिती ॥१३॥ माळा तोडिती तडतडां । मणि फोडिती कडकडां । आवेश आलासे माकडां । उडती झाडां आवेशें ॥१४॥ हातीं धरोनियां पुच्छी । अश्व झुगारिती आवेशीं । भीति नाहीं कन्हीयासी[4] । शिबिका[5] सुखासनांसी त्यागिती ॥१५॥ एक वानर आनंदातें । कांखे घेवोनि गजातें । एक कांखे घेती कन्हीयातें । एक अश्वातें घेवोनि फळें खाती ॥१६॥ सकळ सभा पैं हांसत । वसिष्ठ राम आश्चर्य करित । समस्त देव पाहत । विपरीतार्थ वानरांचा ॥१७॥ हांसतां मुरकुंडी वळती । एक एकाकडे पाहती । ऐसियाची सहजस्थिती । बाप रघुपति कृपाळु ॥१८॥

श्रीरामांची उद्विग्नता : तें देखोनि रघुनंदन । झाला अति उद्विग्न । हनुमंतासी समाधान । उपाय कोण तदर्थी ॥१९॥ संतोषावया वानरा । अंकीं बैसविलें आदरा । तें न माने याचिया विचारा । रघुवीरा अति चिंता ॥१२०॥ देश दुर्ग देऊं यासी । तेंही न माने हनुमंतासी । निःस्पृह सर्वथा मानसीं । देशदुर्गासी पें न घे ॥२१॥ माझ्या अंकावरी पूजन । स्वयें न मानी वायुनंदन । रत्नें टाकितसे तोडून । माळा जाण विखुरल्या ॥२२॥ आतां यासी उपाय एक । सर्वे जेवोनि आवश्यक । घ्यावे हनुमंताचे शेख । उपाय आणिक दिसेना ॥२३॥ ऐसा करोनि विचार । कृपापूर्वक रघुवीर । बोलावोनि हनुमान वीर । काय उत्तर बोलते ॥२४॥

श्रीरामांची मारुतीला विनंती : पवनात्मजा परिस विनंती । तुझी पूजा निजनिश्चतीं । स्वयें नेणेंचि मी मूढमती । क्षमा ये अर्थी करावी ॥२५॥ क्षमा करोनि सकळिक । जेणें तुज वाटे सुख । तेंचि सांगावें आवश्यक । करणें निःशेख तें मज ॥२६॥ म्हणोनि वंदोनियां चरण । हृदयीं धरिला आलिंगून । हृद्गत सांगावें संपूर्ण । करणें जाण तेंचि मज ॥२७॥ येचविषयीं सर्वथा । आन करणें नाहीं चित्ता । मज आन नाहीं पढियंता । आण तत्वतां पैं तुझी ॥२८॥ तुझी आण वाहिली जाण । हे परमात्म्यावरील प्रमाण । अन्यथा न मानावें आपण । आत्मा जाण तूं माझा ॥२९॥

हनुमंताचे उत्तर : ऐकोनि श्रीरामाचें वचन । हनुमान घाली लोटांगण । श्रीरामवचन अप्रमाण । मानी तो पूर्ण आत्मघाती ॥१३०॥ राम अवतारा अवतारु । तोचि जगाचा जगद्गुरु । त्याचे वचनीं विकल्प थोरु । धरी तो नरु आत्मघाती ॥३१॥ गुरुवचनीं

---

शब्दार्थ - १. दात, २. अती तेजस्वी, ३. कवचे, ४. लहान मुलांस, ५. पालखी.

विकल्पात्मक । न चुकती त्याचे आकल्प[1] नरक । आत्मघाती तो आवश्यक । सुटका देख त्या कैंची ॥३२॥ आतां एक विज्ञापन । जरी दिधलें अभयदान । तरी जें आम्ही घेऊं मागोन । कृपा करोन तें द्यावें ॥३३॥ द्वारा याचक आले असतां । न व्हावें पराङ्मुख सर्वथा । औदार्यें तूं अगाध दाता । दीन मागता मी तुझा ॥३४॥ तूं स्वामी अर्थसंपन्न । मी याचक मागता दीन । जें मागेन प्रीतीकरोन । तें आपण अर्पावें ॥३५॥ ऐकोनि हनुमंताचें वचन । श्रीराम झाला सुखैकघन । संकट निरसिलें हनुमेन । मागेल आपण तें देऊं ॥३६॥ आम्हांसी होती परम चिंता। काय अर्पावें हनुमंता । तें निरसिलें तत्वतां । झाला मागता स्वयेंचि । ॥३७॥ ऐसें विचारोनि निश्चयेसीं। आज्ञा केली हनुमंतासी । जे जे अपेक्षा मानसीं । तें प्रीतीसीं मागावें ॥३८॥

त्याची नैवेद्य-प्रसादाची मागणी : ऐकोनि श्रीराम वचन । हनुमान झाला आनंदघन । दिधलें अभय वरदान । तरी ऐक मागेन तें स्वामी ॥३९॥ असतां वनांतरीं । उपवासी फळाहारी । पारणाविधीची परी । आम्हीं डोळेभरी पहावी ॥१४०॥ पारणाविधीचें शेख[2] । आम्हां पावल्या आवश्यक । संभावना सकळिक । एक एक पावली ॥४१॥ येविषयीं शिष्टांचें । वचन ऐकिलें साचें । बळ धरोनियां त्याचें । करू याचनेतें स्वामिया ॥४२॥ येचविषयींचा श्लोकार्थ । स्वामी ऐका सावचित्त । निजप्रेमें कृपायुक्त । ऐका निश्चित कृपानिधी ॥४३॥

महाप्रसाद इत्युक्त्वा ग्राह्यमंजलिभिर्बुधैः । पादोदकं च निर्माल्यं नैवेद्यं च विशेषतः ॥१॥

नैवेद्यप्रसादाचा महिमा : झालिया पूजाविधान । तीर्थ प्रसाद निर्माल्य जाण । स्वामीपासीं प्रार्थन । करोनि आपण मागावें ॥४४॥ प्राप्त होय नैवेद्यशेख । तरी भाग्य अलोलिक । आगमीं[3] निर्वचन देख । श्रुति सम्यक् गर्जती ॥४५॥ निजदासाचा धर्म पूर्ण । शेष मागावें प्रार्थून । तें हाता आलिया जाण । सकळ संभावना पावली ॥४६॥ होते श्रीरामाचें मनीं । तेंचि मागितलें हनुमेनी । एकें अन्वयें वर्तती दोनी । देव भक्त होवोनी श्रीराम ॥४७॥ तें अपूर्व निरूपण । निजभक्तासी आपण । निजशेष देवोनि पूर्ण । रघुनंदन सुखावेल ॥४८॥ एका जनार्दना शरण । निजभक्ताचे प्रेम पूर्ण । कृपापूर्वक सावधान । निजनिरूपण परिसावें ॥१४९॥ स्वस्ति श्रीभावार्थराभायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमद्विनोदचरितं नाम सप्ताशीतितमोऽध्यायः ॥८७॥ ओंव्या ॥१४९॥ श्लोक ॥१॥ एवं ॥१५८॥

## अध्याय अठ्ठ्याऐंशीवा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### सर्वांना नैवेद्य-प्रसादाचा लाभ

हनुमंताची प्रार्थना : पूर्वप्रसंगीं हनुमंतें । विनविलें श्रीरामातें । सारोनि पारणाविधीतें । प्रसाद आमुतें द्यावा स्वामी ॥१॥ सौमित्र आणि भरत । जानकीमातेसमवेत । पारणें सारोनि निश्चित । करावें तृप्त सकळांसी ॥२॥ ब्रह्मादि सुरपंक्ती । प्रसादाची वाट पाहती । निजसेनेचे सेनापती । आकांक्षिती सुमंतादिक ॥३॥ बिभीषणसुग्रीवादि जाण । अंगद युवराजा आपण । नळनीळादि कपिगण । प्रसाद पूर्ण वांछिती ॥४॥ जांबवंत सुषेण दधिमुख । श्रीरामप्रसादा सकळिक । अवघे असती साकांक्ष । त्यांसी आवश्यक सुखावीं ॥५॥ म्हणोनि घातलें लोटांगण । तें देखोनि सकळ जन । स्वयें झाले सुखैकघन । हनुमंतें विंदान[4] साधिलें[4] ॥६॥

---

शब्दार्थ – १. कल्पपर्यंत, २. शिल्लक, ३. शास्त्रात, ४. युक्ती केली.

**सर्वांकडून हनुमंताला धन्यवाद :** आम्ही म्हणों श्रीरामचंद्र । वस्त्रें भूषणें अलंकार । देवोनि बोळविले सत्वर । निजशेष सादर न देचि ॥७॥ ते आमची सकळ चिंता । भली निरसिली हनुमंता । प्रसन्न करोनि रघुनाथा । शेष तत्वतां मागितलें ॥८॥ म्हणोनि हरिखेले समग्र । आनंदें करोनि जयजयकार । नामें गर्जिन्नलें अपार । चराचर दुमदुमिलें ॥९॥ देखोनि सकळांचा उत्सावो । संतोषला रामरावो । सकळां शेषीं आदर पहा हो । सुरसमुदावो ब्रह्मादि ॥१०॥

**सर्व भक्तांना भोजनप्रसाद देण्याचा रामांचा निश्चय :** वानरें तरी आळुंकीं[1] । लुलु[2] करित प्रसादाविखीं[3] । त्यांसी न करितां पै सुखीं । अत्यंत दुःखी होतील ॥११॥ लौकिक अपवाद गहन । श्रीरामकार्यालागीं जाण । जीवित्व तुच्छ करोनि पूर्ण । निजप्राण वेंचिलें ॥१२॥ त्यांसी भुकें तळमळित । प्रसाद नेदी रघुनाथ । बोळविले निजभक्त । हीनवृत्त थरोनियां ॥१३॥ ऐसें लोकांचे अपवाद । माथां बैसती अगाध । विचार करोनियां शुद्ध । भक्तवृंद सुखावूं ॥१४॥ ऐसे करोनि निश्चित । माता कौसल्या त्वरित । बोलावोनि रघुनाथ । विचार करित तियेसीं ॥१५॥ मिनले सुरवरांचे भार । लोकपाळादि समग्र । ब्रह्मा आणि पैं शंकर । सिद्ध चारण गंधर्व ॥१६॥ चित्तें वित्तें जीवितें । अनुसरोनि निश्चितें । वानरीं आम्हां केलें सरतें[4] । निजविजयातें देउनी ॥१७॥

**कौसल्या मातेला स्वयंपाक तयार करण्यास रामांनी सांगितले :** त्रैलोक्यांत माझी ख्याती । व्हावया कारण मुख्य जुत्पती । त्यांसी द्यावया निजतृप्ती । पाकनिष्पत्ती करावी ॥१८॥ ऐसें सांगतां रघुपती । माता सुखावली निश्चितीं । जें म्यां धरिलें होतें चित्तीं । तेचि रघुपतीं योजिलें ॥१९॥ ब्रह्मा शिव सुरगणां । लोकपाळेसीं पाकशासना । पाहुणेर रघुनंदना । निजानंदें जाण करावा ॥२०॥ श्रीरामाचे आवडते । वानर जीवाहून पढियंते । साह्य झाले श्रीरामातें । आवडीं त्यातें वाढीन ॥२१॥ भोंवत्या सुरवरांच्या पंक्तीं । मुनि सिद्ध ऋषि निश्चितीं । मध्ये माझा रघुपती । जेंवी उडुगणपति[5] आकाशीं ॥२२॥ वृत्रवधीं इंद्रपूजा । सुरवर करिती जैशा वोजा । तेंवी भोजनीं रघुराजा । निजवोजा पूजीन ॥२३॥ हेंचि माझें निजपूजन । षड्रस निप्पजवीन सदन्न । ऐक तयांचे लक्षण । निजविंवचन सांगेन ॥२४॥

**षड्रसयुक्त अन्नाचे लक्षण :** लेह्य[6] पेय[7] चोष्य खाद्य । याचें नांव चतुर्विध । भक्ष्य भोज्य जें विविध । जाण षड्विध येणेंसीं ॥२५॥ चाटूनि घेइजे पूर्ण । तया नांव लेह्य जाण । प्राशन कीजे घटघटून । पेय संपूर्ण त्या नांव ॥२६॥ चोखून घेइजे रस । थुंकून सांडिजे बाकस[9] । तया नांव बोलिजे चोष्य । खाद्यविलास तो ऐका ॥२७॥ कंडनपेषणादि[10] समस्त । पाक न करितां निश्चित । जें खावयास उपयुक्त । खाद्य बोलत तयासी ॥२८॥ विचित्र कोरकियांची परी । रोटी पोळी आदि उखरी । यातें बोलिजे चतुरीं । निजनिर्धारीं पैं भक्ष्य ॥२९॥ क्षिप्रा[11] आणि ओदन[12] । भोज्य म्हणती विचक्षण । एवं षड्रसाचे चिन्ह । निजविंवचन सांगितलें ॥३०॥ त्या रसांचे पाकविधान । करिती राममाता सर्वज्ञ । ऐक तयाचें लक्षण । निजविवंचन अवधारीं ॥३१॥

**भोजनप्रसाद स्वीकारण्यासाठी पंगतीला कोण कोण होते त्यांची नामावली :** पंक्ती बैसल्या भूचर । जळचर यक्ष किन्नर । सिद्ध चारण मुनीश्वर । सुरवर आदिकरोनी ॥३२॥ खेचर भूचर जळचर । दानव मानव विखार[13] । राहिले होते समग्र । श्री रामचंद्रशेषासी ॥३३॥ ब्रह्माआदि ईशान । लोकपाळ सकळ जन । श्रीरामषेशालागून । प्रीति करोन राहिले ॥३४॥ निजप्रधानासी

---

शब्दार्थ - १. भुकेलेली, बुभुक्षित, २. लोभ, ३. प्रसादाकरिता, ४. सर्वमान्य, ५. चंद्र, ६. चाटावयाचे, ७. प्यावयाचे, ८. चोखून खाण्यासारखे, ९. चोथा, १०. कांडलेले, दळलेले, ११. खीर, १२. भात, १३. सर्प.

बिभीषण। सुग्रीवासहित वानरगण। पंक्ती बैसविल्या सावधान। मध्ये रघुनंदन शोभत॥३५॥ नभीं तारांगणांची पंक्ती। मध्ये शोभे निशापती। तेंवी सुरखेचरपंक्ती। मध्ये रघुपति शोभत॥३६॥ मध्ये श्रीराम केवळ। आवरणपंक्ती लोकपाळ। प्रकाशे दीप प्रबळ। राम घननीळ चिज्ज्योति॥३७॥ कौसल्येचें भाग्य गहन। जिचा पुत्र रघुनंदन। जेणें त्रैलोक्य पावन। निजजीवन विश्वाचें॥३८॥

खाद्यपदार्थांचे बहुविध प्रकार : ऐका कौसल्येची परी। पारणाविधी श्रीरामचंद्रीं। वाढीत कौसल्या सुंदरी। निजनिर्धारीं परिसेयीं॥३९॥ चैतन्यतेजें अति चोखटें। समभावें सुवर्णताटें। आनंदरसें पूर्ण वाटे। अपूर्ण कोठे असेना॥४०॥ प्रथम शाखांचिया परी। वाढी कौसल्या सुंदरी। पंक्ती बैसल्या एकसरी। निजनिर्धारीं निजयुक्त॥४१॥ एकी शाखा त्या खंडिवा। एकी केवळ खुडिवा। एकी सदेंठी तोडिवा। एकी सोलिंवा सुवास॥४२॥ एका कडुवटा खणुवाळी। एकी अति तिखट तोंडाळी। एक सलंब पैं सरळी। एक वाटोळी गडबडती॥४३॥ एक हिरवी करकरित। एकी जारसी कचकचित। एकी बहुवीज बुचबुचित। एकी हसहसित कोरडी॥४४॥ एकी अत्यंत आंबट। एकी सबाह्य तिखट। एकी सर्वांगी कडुवट। एक तुरट समसमित॥४५॥ एक वाढोनि जारठलीं। एक मुरडीं मुरकुटलीं। एक सुपुष्पें सारठलीं। एकी तुटलीं अनुवायें[1]॥४६॥ ऐशा फळवल्लीफळभारें। केलें समरस सांबारें। अवघ्या वाघारु वाघारें। निजथारें श्रीरामें॥४७॥ ऐशा नानापरींच्या शाका[2]। परवडी[3] केल्या रघुकुळटिळका। एकेचि स्वादें जेवित देखा। अति नेटका[4] जेवणारा॥४८॥ एकें परपाकें उतटलीं। एक स्नेहदेंठीहून सुटलीं। वनिताहातींहूनि निसटलीं। स्वादा आलीं शिखरणी॥४९॥ झाडीं पिकलें देंठकेणें। तरी आंबे आम्लपणें। शेजे मुराल्या एकांतपणें। न चाखतां घ्राणें चवी फांके॥५०॥ रूप दृष्टीतें बुझावी। वासें घ्राणातें समजावी। वाचा श्रवणें बाप म्हणवी। स्पर्शें निववी त्वचेतें॥५१॥ रसना सेविता रसमात्र। गोडिया विनवी अंतर। सेवितां श्रीरामचरित्र। सबाह्याभ्यंतर सुखरूप॥५२॥ एकलें एक च्यूतफळ। निववीं इंद्रियें सकळ। श्रीरामपंक्ती अच्युतफळ। जग जें सकळ सुखरूप॥५३॥ वैराग्यतापें तापलिया। त्याचि संतापकाचरिया। अनुतापतैलें तळिलिया। चवी आलिया श्रीरामें॥५४॥ एक भोजनीं अविचारितें। सेविती निंदेचें रायतें। चवी चाखतां कुसमुसितें। कपाळ हातें पीटित॥५५॥ नाकीं तोंडी धूर उठी। तळमळोनि कपाळ पिटी। श्रीराम त्यातें न पाहे दृष्टीं। परवडी खोटी भोजनाची॥५६॥ लोणचीं वाढिन्नलीं अनेगें। रंगलीं भक्तिप्रेमरंगें। एक सलवण सर्वांगें। स्वाद श्रीरंगें सेवावा॥५७॥ अहं कडुवट कुहिरी। सोहंलोणचीं रंगलीं खारीं। वैराग्यभोकरें खारलीं खारीं। त्याहीमाझारीं मुरले मिरघोंस॥५८॥ स्वबोधभोकरीवेलेसीं आंवळा। जेवितां चवीनें अति आगळा[5]। मुळींच्या मूळीं गोडिया आला। स्वयें सेविला श्रीरामें॥५९॥ त्रिगुणगुणांचे निजत्रिकूट। निजनिर्गुणें भरिलें बोट। मघमघीत अति उद्भट। अति स्वादिष्ठ श्रीरामें॥६०॥ ऐसीं लोणचीं नेणों किती। मुख्य स्मरण आलें नेणती। तो स्वाद जाणे रघुपती। बैसले पंक्तीं ते धन्य॥६१॥ सूक्ष्म सेवेच्या शेवया। मोंडू नेदितां सगळिया। क्षीरसाकरेशीं आळलिया। स्वयें सेविल्या श्रीरामें॥६२॥ पोकळे वळवेटी सरळीं। एक वाटोळीं लांबोळीं। सेवेमाजी अवघी आलीं। ठायीं पावलीं श्रीरामा॥६३॥

शब्दार्थ - १. संबंधाने, २. भाज्या, ३. प्रकार, ४. चांगला, ५. आंबा, ६. श्रेष्ठ.

परम स्वादाची साखर । पंचरस पंचधार । घृत वाढिलें सर्वसार। स्वादें श्रीरामचंद्र डुल्लत ॥६४॥ अनुतापें सद्यस्तप्त[1] । निजसाराचें सारांश घृत । अखंड धारा स्वयें वाढित । श्रीरघुनाथ निजभोक्ता ॥६५॥ शास्त्रपडिपाडें पापड । नानायुक्ती अति तडफड । जळजळेचे आले फोड । तेणें कडकड मोडती ॥६६॥ यालागीं होते मार्गे । ते ओढोनि भजनमार्गे । निरवोनियां सर्वांगें । श्रीरामभोगें स्वादिष्ठ ॥६७॥ मीतूंपण सांडणें ठायीं । तेचि शुद्ध सांडयी । श्रीराम ठायां येतां पाहीं । सांडी मांडी नाहीं सर्वथा ॥६८॥ स्वयें तप्ततैलीं कुरवडी । स्वयें नुगवेचि बापुडी । शांतिदांतीं केली कुडकुडी । आली रोकडी राममुखा ॥६९॥ विषयलालसेचे लाडू । विवेकें वाढिले फोडफोडूं[2]। तेणें पडिपाडें तिळव्या जाडु । स्वाद गोडू श्रीरामें ॥७०॥ वैराग्यकढें कढली कढी । तीमाजी माया मुगवडी । विरोनि आली स्वादा गाढी । तिची गोडी राम जाणे ॥७१॥ त्यामाजी जिरें मिरें कापुरा । तेणें सुवास चढे अंबरा । रस सेविती फरफरां । श्रीराम चंद्राचेनि धर्मे ॥७२॥ भजनभावाच्या इडुरिया । क्षीरसागरींच्या क्षीरधारिया। सबाह्य गोड गुळवरिया । पूर्ण पुरिया परिपूर्ण ॥७३॥ भजनभेदें सफेत फेणी । प्रेमशर्करा भरली भरणी । अमृतफळातें लाजवोनी । वाढिलें आयणी आंबवडे ॥७४॥ नुसधी गोडियेची घडली । तैसी खांडवी वाढली । चंद्रबिंबीची काढिली । घडी मांडिली मांडियांची ॥७५॥ मांडियांची नवलपरी । चतुर्वेद घडिया चारी । कर्मकानवटी उत्तरी । श्रीरामचंद्रीं निजस्वाद ॥७६॥ विवेकसांडणी अति सोज्ज्वळ । उभयभागीं निजतेजाळ । तांदुळ वेळिले भावबळ । अति सोज्ज्वळे अरुवार ॥७७॥ सोहं ओगराळे सनाथ । अलिप्तपणें भरिला भात । ठायीं वाढिला न फुटत । श्रीरघुनाथ निजभोक्ता॥७८॥ अन्नीं वरान्नश्रेष्ठता[3] । सबाह्य कोंडा झाडिला परता । चढला मध्यनायकाच्या माथा । प्रिय रघुनाथा यालागीं ॥७९॥ सर्व स्वादांचें कारण । स्वयें श्रीराम आपण । यालागीं वरी वाढिलें लवण । अपूर्ण तें पूर्ण श्रीराम करी ॥८०॥ श्रीरामपंक्ती रसपीयूख[4] । ज्यासी श्रद्धेची असे भूक । ग्रासोग्रासीं चढतें सुख । हे परवडी देख त्यालागीं ॥८१॥ न्यून नाहीं श्रीरामपंक्ती । जेवितां जेविते चवी जाणती । रुचलेपणें जाण वाढिती । अति सुमति कौसल्या ॥८२॥ राममाता सावधान । जाणे तृषिताचें लक्षण । सबाह्य निववीत संपूर्ण । जीवा जीवन देतसे ॥८३॥ कौसल्या स्वये खुणाविती । चारी मुक्ती तेथें राबती । जें जें ज्याचे मनोगतीं । तें तें देती त्या ठायीं ॥८४॥ पहिलें नवजणी वाढत्या । चौघीजणी पूर्ण कर्त्या । जें पंक्ती श्रीराम भोक्ता । अतृप्तता तेथें कैंची ॥८५॥

जेवणारांनी तृप्तीची ढेकर दिला : एवं तृप्तीचा ढेंकर । देती स्वानंदें उद्गार । स्वादें कोंदलें जेवणार । श्रीरामचंद्र निजपंक्ती ॥८६॥ कौसल्या सावधान वाढी । सुरवर खेचर[5] परवडी । ब्राह्मणतृप्ति झाली गाढी । धोत्रे बुडीं ढिलावती[6] ॥८७॥ ऐसी सकळां आनंदतृप्ती । झाली असे श्रीरामपंक्ती । ज्यालागीं योजिलें रघुपती । अभिनव कीर्ति सांगणें असे ॥८८॥ अति प्रेमाचिये प्रीतीं । हनुमान आवडता रघुपतीं । त्याकारणें कौसल्यैहातीं । पाकनिष्पत्ती करविली ॥८९॥ ताट विस्तारोनि परिकरें। हनुमंतासी अति आदरें । बोलोवोनि रघुवीरें । मधुर उत्तरें अनुवादे ॥९०॥

श्रीरामांची हनुमंताला पंक्तीला भोजनास बसण्याची विनंती : हनुमंता सर्वज्ञा । तुवां पूर्वी केली आज्ञा । सारूनि विधिपारणा । अपेक्षा मना शेषाची ॥९१॥ तेणें[7] अन्वयें[7] कौसल्या जननी । षड्रसपाकांची मांडणी । संपादिली तुजलागूनी । ताटें विस्तारोनी तिष्ठत ॥९२॥ तुम्ही आम्ही

---

शब्दार्थ -१.ताजे कढविलेले, २. फोडून फोडून, ३. वरणाची थोरवी, ४. पीयूष-अमृत, ५. आकाशसंचारी, ६. सईल करतात, ७. त्यासाठी.

झडकरी । सर्वे जनकजा सुंदरी । भरत शत्रुघ्न आदरी । प्रीति थोरी सौमित्रा ॥९३॥ सकळ बैसोनि सांगातें । संपादूं पारणाविधीतें । आज्ञापितां श्रीरघुनाथें । येरु निश्चितें अति कुशल ॥९४॥ आज्ञापितां रघुनाथ । माथां वंदोनि वचनार्थ । युक्तायुक्त न विचारीत । बैसे त्वरित सांगातें ॥९५॥ राम सुरवरां वर । नीच आपण वनचर । ऐसा करितां विचार । शेष सत्वर न ये हाता ॥९६॥ स्वर्वे बैसावया सम्यक । आणिक उपाय असे एक । होतां अंगस्थ बाळक । श्रीरामशेख तें लाभे ॥९७॥ श्रीराम कृपाळु जननी । भक्तीं प्रीति बाळाहूनी । भक्तापरी रघुनंदनीं । नाहीं त्रिभुवनीं आवडतें ॥९८॥

**रामाज्ञेप्रमाणे हनुमंत पंक्तीला येऊन बसल्यावर सर्वांनी रामनामाच्या जयघोषात आपोशने घेतली :**

ऐसे जाणोनि निश्चित । सवें बैसला हनुमंत । श्रीराम सकळां वेगें म्हणत । घ्याव्या निश्चित प्राणाहुति ॥९९॥ सुरनरादि खेचर । सिद्ध[1] चारण मुनीश्वर । नाग यक्ष पैं किन्नर । घ्या हो समग्र प्राणाहुति ॥१००॥ दानव मानव समग्र । वसिष्ठादि ऋषीश्वर । सुग्रीवादि वानरभार । राक्षसभार बिभीषणादि ॥१॥ आज्ञापितां रघुनंदन । रामनामें गडगर्जन । सकळीं जयजयकार करोन । आपोशनें घेतलीं ॥२॥

**श्रीराम प्रेमाने मारुतीच्या मुखात घास घालू लागले. परंतु मारुतीचा सर्वांआधी घास घेण्यास नकार :**

अति प्रीतीं रामराणा । कवळ उचलोनि जाणा । देता आला वायुनंदना । येरु चरणां लागला ॥३॥ स्वामी कृपाळु रघुपती । भक्तप्रीति तुझ्या चित्तीं । ग्रास घालिसी मुखाप्रती । निजस्फूर्ती विसरोनी ॥४॥ परंतु एक विज्ञापन । कृपापूर्वक रघुनंदन । स्वामी परिसावें आपण । तरी मी वचन बोलेन ॥५॥ म्हणोनि चरणीं ठेविला माथा । तेणें संतोष रघुनाथा । स्वयें आज्ञापी हनुमंता । आवडे चित्ता तें सांग ॥६॥ ऐकोनियां तें वचन । हनुमान जाला सुखैकघन[2] । विनविला रघुनंदन । आधीं आपण ग्रास घेणें ॥७॥ सर्वेचि घेईल लक्ष्मण । पाठी भरत शत्रुघ्न । जनकनंदिनी ग्रास घेऊन । अधिकार पूर्ण मग माझा ॥८॥ ऐसें विनवितां हनुमंता । झालें आश्चर्य रघुनाथा । हनुमान नाटोपे सर्वथा । विचार आतां काय करूं ॥९॥ ग्रास न घेतां आपण । हनुमान सर्वथा न घे जाण । शेष दुसरिया ग्रासेंकरून । घेऊं छळून हनुम्याचें ॥११०॥

**श्रीराम-सीता, भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न यांनी घास घेतल्यावर मारुतीला घास घेण्याची विनंती :**

ऐसा करोनि निर्धार । ग्रास घेत रघुवीर । विनविलं सीता सौमित्र । घेईं सत्वर कवळातें[3] ॥११॥ श्रीरामाचे अनुमते। सीतेनें घेतलें कवळातें । सौमित्रही प्रेमें बहुतें । घेत कवळाते मर्यादा ॥१२॥ भरत शत्रुघ्न दोघे जण । तिहीं कवळ घेतां पूर्ण । हनुमान विनवी रघुनंदन । ग्रास आपण सर्वे घ्यावा ॥१३॥ ऐसें सांगतां रामासी । हनुमान लागोनि चरणांसी । श्रीरामासहित सकळांसी । पुसें भोजनासी पैं आज्ञा॥१४॥ निरोप आहे जी आम्हांसी । क्षोभ न यावा कोणासी । कृपा असेल मानसीं । तरी वेगेंसीं आज्ञापिजे ॥१५॥ ऐकोनि हनुम्याचें वचन । हांसिन्नले सकळ जन । रामें देतां आज्ञापन । विषाद कोण मानील ॥१६॥ श्रीरामआज्ञा उल्लंघन । करी ऐसा पापी आहे कोण । त्यासी जाण पां अधःपतन । नरक दारुण पैं होती ॥१७॥ सर्वे सांगे रघुनंदन । म्यां देतां आज्ञापन । विषाद मानूं शके कोण । ग्रास आपण सर्वे घ्यावा ॥१८॥ सकळ तुजलागीं तटस्थ । बैसले असती वाट पाहत । विलंब न करावा निश्चित । घ्यावें त्वरित कवळातें ॥१९॥

---

शब्दार्थ - १. देवयोनिविशेष, २. अती संतुष्ट, ३. ग्रास.

परंतु मारुतीने घास न घेता श्रीरामांच्या प्रसादाचे ताट उचलून उड्डाण केले : आज्ञापितां रघुनंदन । येरें घालोनि लोटांगण । ताट उचलोनि जाण । केलें उड्डाण आकाशीं ॥१२०॥ देखोनि तयाचें लाघव[1]। स्वयें हांसतसे राघव । कैसा साधिला अभिप्राव । अन्य गौरव हनुम्याचें ॥२१॥ आम्ही ठकवोनि घेवों पाहों शेष । तंव येणेंचि ठकविलें आम्हांस । ऐसें विचारोनि राघवेश । हनुमंतास पूसत ॥२२॥ काय केलें वायुनंदना । तीक्ष्णबुद्धि विचक्षणा । तुझ्या शेषालागीं जाणा । आम्ही संगातें बैसलों ॥२३॥ तंव त्वां विंदान साधिलें । सकळ आसावलें[2] सांडिलें । अवघें ताट उचलोनिया नेलें । वेडाविलें आम्हांसी ॥२४॥ ऐसें पुसतां रामरावो । येरु हांसोनि लवलाहो । लोटांगण घालोनि पहा हो । स्वयमेवो विनवित ॥२५॥

भक्ताचे उच्छिष्ट देवाने भक्षू नये म्हणून मी ताटासह उड्डाण केले असे मारुतीचे स्पष्टीकरण : ऐक स्वामी रघुनंदना । तूं कृपाळु दीनजनां । तुझ्या शेषालागीं जाणा । भक्तजनां अति प्रीति ॥२६॥ नाना व्रतें यज्ञ दान । पुनश्चरणें अति कठिण । तुझ्या प्रसादालागून । भक्तजन करिताती ॥२७॥ योग योग पैं दारुण । पर्वतपात करितां पूर्ण । तुझा प्रसाद न ये जाण । तो मजलागून पावला ॥२८॥ ऐसें उफराटें घडे कैंवी । जें भक्तशेष श्रीराम सेवी । ऐसे न मानावें गोसावी । मिठी सुटावी कीं भक्ताची ॥२९॥ निजभक्ताचें निजशेख । स्वयें सेवी रघुकुळटिळक । ते विपरीत झाले देख । ऐसें नि:शेख घडेना ॥१३०॥ चंद्र निजकळा विसरोन । चंद्रामृतालागीं पूर्ण । चकोराचे परी जाण । साकांक्षण अमृता ॥३१॥ सूर्य निजतेजा भुलला । प्रकाशातें शोधूं गेला । दरांदरकुटीं[3] रिघाला । कोठडिया लपाला अंधारीं ॥३२॥ महासिंधू तृषित जाहला । क्षुद्र नदिये मागों गेला । तेंवी भक्तशेषालागी वहिला ! राम भुकेला काय सांगों ॥३३॥

मारुतीची आनंदातिरेकाने मर्कटलीला : म्हणोनि मांडिल्या मर्कटचेष्टा । घांस घेतसे घटघटां । मिटक्या देतसे मटमटां । सुरश्रेष्ठां विटावोनी ॥३४॥ वांकुल्या दावी सौमित्रासी । भरता देखोनि खाजवी कुसी । डोळे घुलकावी[4] सीतेसी । शत्रुघ्नासी दावी अंगुष्ठ ॥३५॥ देखोनियां बिभीषणा । काखा खाजवीत जाणा । अंगद सुग्रीवा दोघांजणा । पृच्छेकरोनि जाणा हेळसी ॥३६॥ शेषें मातला वानर । दृष्टि नाणी सुरासुर । दावित मर्कटविचार । अपपर नाठवे ॥३७॥ प्रेम न सरे माकडा । लोळतसे गडबडां । पृच्छ नाचवी रामापुढां । वसिष्ठापुढां कोल्हाटे ॥३८॥

मारुतीची लीला पाहून सर्वजण हंसतात : देखोनि हनुम्याचे विकार । वसिष्ठादि ऋषीश्वर । ब्रह्मादिक पैं सुरवर । श्रीरघुवीर हांसत ॥३९॥ सौमित्र भरत शत्रुघ्न । हांसतसे सीता तें देखोन । वसिष्ठादि ऋषिगण । सिद्ध चारण हांसती ॥१४०॥ ब्रह्मादि सुरपंक्ती । बिभीषण लंकापती । सुग्रीवादि सकळ जुत्पती । हांसताती विस्मयें ॥४१॥ ऐसा करितां गदारोळ । श्रीरामपंक्ती सकळ । तृप्ति पावले बहळ । आनंदकल्लोळ श्रीरामें ॥४२॥ सकळिकांसी झाली तृप्ती । श्रीरामपंक्ती विश्रांती । हनुम्याचे प्रत्युपकारार्थी । कांही युक्ती स्फुरेना ॥४३॥ आतां एक विचार । प्रार्थून हनुमान वीर । काय अपेक्षित तुझे अंतर । तो वर मागावा ॥४४॥ त्रैलोक्या दुर्धर पाहीं । मागतां अटक जें कांहीं । तें तें देईन सर्वही । माग लवलाही मारुती ॥४५॥ हनुम्याचे भजनें भुलला । राम वरा उदित झाला । कृपेचा मेघ वोळला । भाग्यें आथिला हनुमंत ॥४६॥ चातकाचें आळवणासाठीं । जगतीतळीं पहा होय वृष्टी । स्वसुकाळें कोंदे सृष्टी ।

---

शब्दार्थ - १. युक्ती, २. हिरावून नेले, फसविले, ३. दऱ्याखोऱ्यांत, ४. मिचकावी.

क्षुधा उठउठीं पैं निरसे ॥४७॥ तेंवी मारुतीचेनि भजनें । कृपा वोळोनि रघुनंदनें । जग निववी वरदाने । हीन जनें उद्धरती ॥४८॥ देखोनि वत्साचे क्षुधेतें । धेनु दुभे घरापुरतें । तेंवी हनुम्याचे वरदार्थे । निववी जगातें श्रीराम ॥४९॥ ऐसा अपूर्व प्रस्तावो । कृपा वोळोनि रामरावो । पुढिले प्रसंगीं वदेल पहा हो । अभिनव भावो तेथींचा ॥१५०॥ एका जनार्दना शरण । कृपा वोळला रघुनंदन । हनुमंतासी वरदान । स्वयें आपण देतसे ॥५१॥ तं वदावया वरदान । श्रोते साधु संत सज्जन । कृपापूर्वक पसायदान । प्रीति करोन मज द्यावें ॥१५२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामशेषहनुमत्प्राप्तिनिरूपणं नाम अष्टाशीतितमोऽध्यायः ॥८८॥ ओंव्या ॥१५२॥

## अध्याय एकूणनव्वदावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### हनुमंताचे रामप्रेमाचे वर्णन

श्रीरामांनी हनुमंताची स्तुती करून त्याला वरदान देण्याची इच्छा दर्शविली : धन्य हनुम्याचा भावार्थ । धन्य हनुम्याचा पुरुषार्थ । धन्य हनुम्याचा सिद्धार्थ । जेणें रघुनाथ वोळला ॥१॥ न मागतांही निश्चयेंसीं । माग म्हणे आवडीसीं । निजदासीं कृपा ऐसी । हर्षे त्यासी मग म्हणे ॥२॥

प्रसन्नो हि हनूमंतमुवाच रघुनंदनः । वरं वृणीष्व चाद्य त्वं महत्कार्यं कृतं त्वया ॥१॥

तुझिया महत्कार्याची कथा । वाचे न बोलवे सर्वथा । तुझा ऋणी मी हनुमंता । जाण तत्वतां निश्चयें ॥३॥ काय अपेक्षी[1] तुझें चित्त । जें दुष्प्राप्य[2] त्रैलोक्यांत । तें तें मागावें निश्चित । कृपा रघुनाथ वोळला ॥४॥

एवमुक्तोऽब्रवीद्रामं हर्षपर्याकुलेक्षणः । यावद्रामकथा देव पृथिव्यां विचरिष्यति ॥२॥

तावदेव मयि प्राणास्तिष्ठंत्स्तु वरदोसि मे । यावद्रामकथा लोके चंद्रसूर्यौ ग्रहादयः ॥३॥

हनुमंताची प्रेमावस्था : देखोनि कृपेचा उत्कर्ष । हनुमान झाला हर्षमानस । प्रेमाश्रु चालिले नेत्रांस । कंप गात्रांस पैं आला ॥५॥ अंगी रोमांच बाष्प कंठासीं । स्वेद चालिला सर्वांगासी । लोटांगण अति प्रीतीसीं । मिठी चरणांसी घातली ॥६॥ प्रेमा जिरवोनियां पोटीं । गद्गद बोले वाक्पुटीं । स्वामी बोललेति कृपादृष्टीं । सभाग्य सृष्टीं मी एक ॥७॥

जोपर्यंत पृथ्वीवर रामकथा अस्तित्वात आहे तोपर्यंत माझे प्राण असावेत अशी रामांजवळ हनुमंताची मागणी : कृपा वोळली रघुनाथा । तरी ऐसें करावें स्वामिनाथा । जंव पृथ्वीवरी रामकथा । तंववरी असावे तत्वतां प्राण माझे ॥८॥ जेथें जेथें रामकथन । तेथें तेथें मस्तकांजली पूर्ण । असावें माझें अधिष्ठान । हेंचि वरदान मज द्यावें ॥९॥ जिणयाचें फळ तत्वतां । नित्य श्रवणीं रामकथा । वाचेंसीं रामगुण वर्णितां । उसंत चित्ता नसावी ॥१०॥ ऐसी नामाची काय प्रीती । स्वामी ऐकावें तदर्थी । तुझ्या नामाची निजख्याती । यथानिगुती सांगेन ॥११॥

आकृष्टिः कृतचेतसां समुहतामुच्चाटनं चांहसामाचांडालममूकमात्रसुलभो वश्यश्च मोक्षश्रियः ॥
नोदीक्षां न च दक्षिणां न च पुरश्चर्यामनागिष्यते मंत्रोयं रसनास्पृगेव फलति श्रीरामनामात्मकः ॥४॥

---

शब्दार्थ – १. इच्छित आहे, २. मिळण्याला कठिण.

रामनाममंत्राचे असाधारण महत्त्व मारुतीने विशद केले : वैरी उच्चाटावया पूर्ण । लोभें करिती अभिचारण[1] । ते उच्चाटन गौण जाण । ऐक लक्षण तयाचें ॥१२॥ सांग झालें कर्माचरण । तेणें एका शत्रूचें होय हनन । तरी वैर न खंडे जाण । आणिक पूर्ण उठती शत्रु ॥१३॥ कामक्रोधादि वैरी क्रूर । व्यापून ठेले अंतर । ते क्षणोक्षणां करिती मार । योनि अघोर भोगविती ॥१४॥ विषयलोभेंकरोनि पूर्ण । जे करिती दुराचरण । त्या भोगविती अधःपतन । बांधोनि जाण श्रीरामा ॥१५॥ जें त्या विषयाचरणारहित । तें पापाचें खाणोनि खत । कामक्रोधांचा निजघात । कर्तें निश्चित नाम तुझें ॥१६॥ म्हणसी पाहिजे अधिकार । ऐक तयाचा विचार । नलगे शास्त्रांचा संभार । श्रुतिउपचार[2] पैं नलगे ॥१७॥ नलगे काव्यनाटकव्युत्पत्ती । पुरश्चरणाची कायसी स्थिती । तीर्थाची कायसी गती । योगवृत्ति जे नव्हे ॥१८॥ त्या कल्मषाचा[3] महाकंद । खाणावया अति अगाध । द्विअक्षर मंत्र प्रसिद्ध । द्वेषद्वंद्वदाहक ॥१९॥ राम ऐसें वर्णद्वये । रसनेसी स्पर्श होता पाहें । मुक्ति वोळंगती स्वयें । दास्यत्वेंसीं त्वतता ॥२०॥ न लगे दीक्षा न लगे दान । योग याग पुरश्चरण । मंत्र तंत्र तीर्थाटण । व्रतादि जाण कांहीं न लगे ॥२१॥ रामनामाक्षरद्वयासी । भेटी होतांचि रसनेसीं । जाळोनि कल्पषांच्या राशी । मोक्षश्रियेसी वरी स्वयें ॥२२॥ हें तुझ्या नामाचें महिमान । सांगितलें अत्यंत गौण । त्याहूनि नाम-महिमान । सांगतां वचन सरेना ॥२३॥ तथापि कांहीं संकेताकारें । नाममहिमा प्रेमभरें । सांगेन तेथें रघुवीरें । अत्यादरें कृपा करणें ॥२४॥ तेचिविषयींचा श्लोकार्थ । स्वामी परसा सावचित्त । नाममहिमा अत्यद्भुत । श्रोते परिसोत अत्यादरें ॥२५॥

वेपंते दुरितानि मोहमहिमा संमोहमालंबते । सातंकं नखरं जनं कलयति श्रीचित्रगुप्तः कृती ।
स्वानंदं मधुपर्कसंभृतिविधा वध्वा करोत्युद्यमम् वक्तुं नाम्नि तवेश्वराभिलषिते ब्रूमः किमन्यत्परम् ॥५॥

श्रीरामनाममहिमा : तुझिया नामाची आवडी । जीवीं उपजतां रोकडी । कोण कोणां पडे सांकडी । ऐक निर्वडी[4] श्रीरामा ॥२६॥ तुझे नामोच्चारीं आदर । ऐक तयांचा बडिवार । महापातकांचा संभार । कांपे थरथर निजधाकें ॥२७॥ वाचे उच्चारावया तुझें नाम । जीवीं धरिले असे प्रेम । क्षणें आमुचें करील भस्म । भय दुर्गम नामाचें ॥२८॥ नाम उच्चारिलें नाहीं येणें । तंव तें स्थळ टाकोनि जाणें । अन्यथा नुरिजे जीवें प्राणे । निश्चय करणें महापापीं ॥२९॥ जेणें भ्रमें उपजे पातक । तो भ्रमचि भ्रमातें पावे देख । नामोच्चारीं आवडी चोख । करी निःशेख निर्मोह ॥३०॥ पाप लिहिती चित्रचिचित्र । त्यांसी अलोट पडे विचार । हा करूं पाहे नामोच्चार । पापाचार केंवी राहे ॥३१॥ म्हणोनि खुंटलें लेखन । लेखनीं सर्वथा न चाले जाण । वर्णाक्षरउच्चारण । निश्चयें पूर्ण नाठवे ॥३२॥ असो या क्षुद्रांची गती । मुख्य ब्रह्मा लोकपती । त्यासींही पडे विचार चित्तीं । दूतांप्रती करी आज्ञा ॥३३॥ आनंदमय होवोनि पूर्ण । दूतां आज्ञापी चतुरानन । पैल करूं पाहे नामस्मरण । पूजाविधान सिद्ध करा ॥३४॥ विधिपूर्वक अभिषेक । मधुपर्कविधि पूजा देख । करोनि पावावया ब्रह्मलोक । चतुर्मुख तिष्ठत ॥३५॥ नामोच्चारीं आवडी धरितां । ऐसी पदवी रघुनाथा । तें सर्वदा नाम जपतां । कोण अर्था न पाविजे ॥३६॥

जेथे रामनाम तेथे माझी उपस्थिती असावी अशी मारुतीची मागणी : यालागीं स्वामी रघुपती । जेथे जेथें तुझी नामकीर्ती । निमेष असेल होती। तेथें मारुतीने असावें ॥३७॥ जेथें श्रीराम-

---

शब्दार्थ - १. नीचदेवतापूजन, २. वेदविहित विधी, ३. पापाचा, ४. निश्चित.

संकीर्तन । तेथे म्यां मस्तकांजलि संपूर्ण । तिष्ठत असावें अनवच्छिन्न[१] । हे वरदान मज द्यावें ॥३८॥ श्रवणीं श्रवणाची आवडी । वाचेसी हेचि नित्य गोडी । नाम गर्जतां अति प्रौढीं । उद्धरी कोडी पतितांच्या ॥३९॥ तुझ्या निजनामेंकरून । महापापाचें करोनि कंदन । प्रायश्चिता बोळवण । जगउद्धरण श्रीरामें ॥४०॥ केवळ नव्हे माझी अवस्था । ज्यासी नामीं आवड चित्ता । त्याचेनि जगासी पावनता । नित्य मुक्तता श्रीरामें ॥४१॥

रामनामस्मरणाने कोणाचाही उद्धार करावा अशी मारुतीची रामांना प्रार्थना : माझें मागणें हेंचि परम । उत्तममध्यमादि अधम । सकळीं स्मरावा श्रीराम । मरणजन्मच्छेदक ॥४२॥ वेदशास्त्रीं अधिकारता । ज्यासीं नाहीं तत्वता । त्यासी नाम द्यावें रघुनाथा । उद्धारता श्रीरामें ॥४३॥ स्त्रीशूद्रादि केवळ । नीचयोनीचे चांडाळ । महापतित अमंगळ । नामें सकळ उद्धरावे ॥४४॥ जे एकवार जपती नाम । ते करावे नित्य निष्काम । जे नाम ऐकती सप्रेम । सर्वोत्तम करावे ते ॥४५॥ श्रोत्यां वक्त्यांतें देखोन । संतोष पावे ज्यांचें मन । त्यांहीं पावावें कल्याण । रघुनंदननिजकृपा ॥४६॥ नामधारकांतें निर्भर्त्सिती । द्वेषिती त्रासिती उपाहासिती । नानापवाद घालिती । उपद्रविती दुष्टत्वें ॥४७॥ त्यांची जावोनि दुष्टवृत्ती । शुद्ध निर्विकल्प स्थिती । पावोनियां निश्चितीं । श्रीरघुपति उद्धरावें ॥४८॥ विकल्पाचा विकल्प तोडीं । अधर्माचें दौरात्म्य[२] मोडीं । संदेहाचा संदेह फेडीं । निजप्रौढी श्रीरामा ॥४९॥ सकळ जन स्वानंदमग्न । सकळ जन संकल्प निरसोन । नामें करावे सुखसंपन्न । हेंचि वरदान मज द्यावें ॥५०॥

सर्वेपि सुखिन: संतु सर्वे संतु निरामया: । सर्वे भद्राणि पश्यंतु मा कश्चिद्दु:खमाप्नुयात् ॥६॥

जे जपहीन तपोहीन । व्रतपुरश्चरणदानविहीन । योगयागतीर्थाटन । कांहीं साधन जाणती ना ॥५१॥ सत्संगाचें नेणती सुख । वैराग्याचा गंध नि:शेख । श्रवणाचें न देखती मुख । ते सकळिक उद्धरावे ॥५२॥ संसाररोग अति दुर्धर । पापभोगांची यातना क्रूर । पीडिजेती जीवमात्र । भोगिती अघोर नीचयोनी ॥५३॥ त्यांसी रामनामरससार । देवोनि उपचारावें[३] सत्वर । मोडोनि भवरोगाचा थार । नित्य अक्षर[४] करावें ॥५४॥ निरसोनियां द्वेषद्वंद्व । करावे निर्विकल्प शुद्ध । भोगावया परमानंद । सदानंद श्रीरामें ॥५५॥ विश्व अवघें सुखसंपन्न । सदा असावें स्वानंदमग्न । हेंचि द्यावें वरदान । म्हणोनि लोटांगण घातलें ॥५६॥

विश्वोद्धारासाठी हनुमंताची मागणी ऐकून सर्वजण व श्रीराम संतुष्ट : ऐकोनि हनुम्याचें वरदान । सकळ झाले आनंदमग्न । हनुम्यानें संदेह फेडिला पूर्ण । दीन जन उद्धरिले ॥५७॥ श्रीरामाची प्रसन्नता । हनुमंतीं बाणली तत्वतां । विश्व उद्धरिलें सर्वथा । श्रीरघुनाथाचेनि धर्में ॥५८॥ म्हणोनियां देव दानव । यक्ष किन्नर गंधर्व । सिद्धचारणादि सर्व । पन्नगमानवादिकरोनी ॥५९॥ खेचर भूचर जलचर । बिभीषणादि निशाचर । नामें गर्जती वानर । जयजयकार प्रवर्तला ॥६०॥ तुझेनि नामें साचार[५] । म्यां उद्धरावें चराचर । हनुम्यानें मागतां ऐसा वर । पूर्ण चराचर सुखमय ॥६१॥ बहुकाळ प्राण वांचणें । म्यां मागितलें याचिकारणें । ऐसे मागतां वायुनंदनें । श्रीरघुनंदनें अंगिकारिलें ॥६२॥ जग उद्धरावया साचे । अचाट मागणें हनुमंताचें । अचाट देणें श्रीरामाचें । प्रेम भक्ताचे अति गहन ॥६३॥ हनुम्याच्या प्रेमावेशीं । राम बोळला प्रीतीसीं । स्वयें देतां वरदानासी । कृपा मानसीं अनिवार ॥६४॥

---

शब्दार्थ - १. अखंड, सदोदित, २. दुष्टपणा, ३. उपाय योजावा, ४. नाशरहित, ५. खरोखर.

ततस्तु राघवः प्रीतः परिष्वज्यांजनासुतम् । एवं भवतु भद्रं ते यावद्भूमिर्धरिष्यति ॥७॥
पर्वताश्च समुद्राश्च तावदायुरवाप्नुहि । मैथिल्यापि तदा चैव प्रददौ वरमुत्तमम् ॥८॥
उपस्थास्यंति भोगास्त्वां स्वयमेव जिता हरे । देवदानवगंधर्वास्तथैवाप्सरसां गणाः ॥९॥
यत्र तिष्ठसि तत्रैव सेविष्यंति तथामरम् । एवमस्त्विति चोक्त्वा वै प्रययौ साश्रुलोचनः ॥१०॥

श्रीरामाचे वरदान व हनुमंतप्रतापवर्णन : चित्तस्नेहाच्या निजावेशीं । राम बोळला वरदेसीं । आलिंगोनि अति प्रीतीसीं । काय त्यासी बोलत ॥६५॥ कुरवाळोनि अमृतहस्तीं । प्रेमाचिया अति प्रीतीं । बोलतसे रघुपती । ऐक मारुति सावध ॥६६॥ तुवां मागितलें वरदान । तेथें तुझें नाहीं कारण । विश्वोद्धारा कळवळोन । वरद संपूर्ण मागितलें ॥६७॥ हें माझें अवतारकार्य जाणा । तुवां संपादिले वायुनंदना । कळवळोनि दीनजनां । विश्वोद्धारणा तुवां केलें ॥६८॥ जैसे मागितलें वरदासी । त्याहूनि विशेष पावसी । वर देवोनि हनुम्यासी । कर मस्तकासी ठेविला ॥६९॥ तुझेनि नामें काळ कांपे । कामक्रोध उभाचि करपे । तुझिया नामाचेनि दर्पे । द्वंद्वें निष्पापें स्वये होती ॥७०॥ काळ काम भवभ्रम । तुझेनि नामें होय भस्म । प्राणी होवोनि निष्काम । विश्रामधाम पावती ॥७१॥ तुझेनि सनाथ रामकथा । तुझेनि सनाथ अवतारता । तुझेनि श्रीराम सर्वथा । जाण तत्वतां मारुति ॥७२॥ तुझेनि विख्यात माझे नाम । तुझेनि विख्यात माझें कर्म । तुझेनि सरता[1] श्रीराम । विश्रामधाम जगाचें ॥७३॥ अहिरावणें धरोनि नेलें । दोघां बंधूंसी विंटबिलें । शिरच्छेदासी उभें केलें । सामर्थ्य हरिलें आमुचें ॥७४॥ आम्हां करोनि कृपण[2] । म्हणती तुमचा बळिया कोण । वेगीं करा त्याचें स्मरण । शिरःपतन जाण करावया ॥७५॥ स्मरण करितांचि मारुती । तुझी उडी आली अवचितीं । येवोनि केली बंधमुक्ती । केली शांति निशाचरा ॥७६॥ मज सोडवोनि रघुनाथा । निवटोनियां राक्षसनाथा । सपरिवारें लंकानाथा । शरणागता स्थापिलें ॥७७॥ सोडवोनि सीता सुंदरी । विकल्प निरसोनि निर्धारीं । दिव्यीं[3] उतरोनि झडकरी । प्रीती थोरी भेटविली ॥७८॥ अयोध्ये आणोनि वेगेंसीं । भेटवोनियां भरतासी । अभिषेकोनि आम्हांसी । रामचरितासी संपविलें ॥७९॥ तेथें कायसें माझें वरद । तुझा प्रताप अति अगाध । भक्तिप्रतापें अगाधबोध । परमानंद जगासी ॥१८०॥

हनुमंतनामाचा महिमा स्वतः श्रीराम वर्णितात : तुझेनि सनाथ रामकथा । तुणेनि श्रवणें उद्धरे श्रोता । तुझेनि संगें नाम पढतां । उद्धरे वक्ता तत्काळ ॥८१॥ असो श्रोतयां वक्तयांची कथा । तुझेनि भजनीं आदर धरितां । निष्काम होवोनि तत्वतां । नित्यमुक्तता तो पावे ॥८२॥ जंव पृथ्वी वाहे सकळ भूतें । जीवन जीववी जगातें । वायु चाळवी विश्वातें । चंद्रार्क असती निश्चितें गगनीं ॥८३॥ सुस्थिर बैसका कुळाचळां । तंववरी तुझें आयुष्य गोळांगूळा । चिरंजीवियांमाजि आगळा । प्रताप सोज्ज्वळ पैं तुझा ॥८४॥ त्रुटि लव निमेष पळ । घटिका मुहूर्त काळ । श्रीरामभजनें अचंचळ । लोक सकळ उद्धरसी ॥८५॥ तुझेनि स्मरणें मारुती । भयभीता प्रतापशक्ती । अविरक्तासी विरक्ती । होय निश्चितीं सर्वथा ॥८६॥ संदेहपणाचा संदेह । तुझेनि होय निःसंदेह । विकल्प निर्विकल्पभाव । नामनिर्वाह करी तुझा ॥८७॥ कुतर्क्यांचे कुतर्क मारुती । तुझेनि नामें भस्म होती । शठकपटियांच्या वृत्ती । निष्कपट होती तुझेनि ॥८८॥ नास्तिकांचे शून्यवाद[4] । दांभिकांचे दंभभेद । तुझेनि नामें निर्द्वंद्व । महाबोध

शब्दार्थ - १. श्रेष्ठ, २. दीन, ३. अग्नीवरून चालणे, इत्यादी क्रियांनी, ४. निरीश्वरवाद.

पावती ॥८९॥ कामक्रोधलोभादिक । महापिशाच दुर्जय देख । तुझेनि नामें एकाएक । भस्म निःशेख पैं होती ॥९०॥ इतर पिशाचाच्या कोण कथा । भस्म होती क्षणार्धता । तुझेनि नामें वायुसुता । निर्मुक्तता जगासी ॥९१॥

स्वतःच्या नामाचा महिमा ऐकून मारुती आश्चर्यचकित : वरद वदतां रघुनाथा । येरें चरणीं ठेविला माथा । म्यां प्रार्थिलें कोण्या अर्था । कोण कथा तेथें झाली ॥९२॥ तुझेनि नामें रघुपती । चराचरा व्हावी मुक्ती । ऐसें मागतां स्वामीप्रती । झाली वरदोक्ती विपरीत ॥९३॥ सांडोनि स्वामीचें नाम । आड घालणें प्लवंगम । ऐसा नव्हे भजनधर्म । लोकही विषम मानिती ॥९४॥ ऐसें न करावें स्वामिनाथा । म्हणोनि लोटांगण घालितां । तंव हास्यवदनें तत्वतां । झाला वदतां श्रीराम ॥९५॥

त्या वेळी रामांनी हनुमंत व राम यांतील अभेदत्व सांगितले : श्रीराम आणि हनुमान जाण । स्वरूप एक नामें भिन्न । भेद नाहीं अणुप्रमाण । ऐक विवंचन सांगेन ॥९६॥ विचारितां वस्तुविचारें[1]। मज रूप नाहीं निर्धारें । नाम तेथे कोठें सरे । भ्रममोहिरें[2] नामरूप ॥९७॥ ऐसिया नामरूपातीतासी[3] । भक्तीं आणोनियां रूपासी । स्वामित्व देवोनि प्रीतीसी । वैकुंठवासी मज केलें ॥९८॥ लक्ष्मीऐसी अनुचर । कौस्तुभादि अलंकार । भक्तीं देवोनि अपार । राज्यधर मज केलें ॥९९॥ हृषीकेशादिक नांवें । भक्तीं अर्पिलीं निजगौरवें । नामें विश्व उद्धरावे । हेहीं करावें निजभक्ती ॥१००॥ असो इतर भक्तांची हे कथा । पूर्वी मज रघुनाथा । सर्वथा कोणी जाणत नव्हता । वनीं फिरतां अनाथत्वें ॥१॥ सीतावियोगें दुःखातुर । दोघे बंधु जैसे किंकर । झालों होतो वनचर । नेदी आधार पैं कोणी ॥२॥ तुवां भेटोनि कपिनाथा । सुग्रीव सखा मज रघुनाथा । तुवां करोनि दिला तत्वतां । वाळिघाता करविले ॥३॥ निर्दाळोनि राक्षसमांदी । तुवां आणिली सीताशुद्धी । महा पाषाणीं जळनिधी । निमेषामधीं बांधिला ॥४॥ विश्वेश्वरासी भेटोन । निमेषार्धे लिंग आणोन । सेतुबंधमाहात्म्य गहन । जगदुद्धार तुझेनि ॥५॥ विध्वंसोनि लंकाभवन । सकळ सैन्य प्रधान । निवटिला दशानन । अर्ध क्षण न लागतां ॥६॥ सुरवरांचे बंदिमोचनीं । शरणागता संस्थापूनी । सोडवोनि जनकनंदनी । समाधान जनीं दीधलें ॥७॥ गुढी आणोनि प्रीतीसी । भेटविलें भरतासी । सुरवरांच्या गडगर्जेसी । अयोध्यानगरासीं प्रवेश ॥८॥ अद्‌भुत ख्याति करोनि जाण । अभिषेक केला मजलागून । जगद्वंद्य केलें पूर्ण । तुवां एकलेनि हनुमंता ॥९॥ एवढा तुझा कृतोपकारीं[4] । हेहीं सांगितलें संक्षेपाकारीं । याहूनि तुझी अगाध थोरी । केंवी वैखरी बोलो शके ॥११०॥ सत्यत्व मानीं माझिया बोला । मी श्रीराम तुझा केला[5] । तुझेनि जगद्वंद्य झाला । प्रताप वाखाणिला तुझेनि ॥११॥ तुझेनि माझी शौर्यशक्ती । तुझेनि माझी प्रतापख्याती । नामें महापापी उद्धरती । हेही वरदोक्ती तुझेनि ॥१२॥

माझ्याप्रमाणे माझ्या भक्ताचा महिमा आहे : यालागीं निजनिर्धारीं । मी तुझ्या सबाह्याभ्यंतरीं तुझ्या इंद्रियाचे व्यापारीं । निरंतरी मी वर्ते ॥१३॥ याचे नवल नव्हे मारुती । जे तुझें नाम स्मरती । त्यांपासीं मी रघुपती । तिष्ठे निश्चितीं सर्वदा ॥१४॥ मजपरीस हनुमंता । सर्वस्वें भजतां माझ्या भक्ता । अति आल्हाद मज रघुनाथा । तें सुख सर्वथा न बोलवे ॥१५॥ जेंवी पूजिल्या निजबाळक । माता सुखावे आत्यंतिक । तेंवी मद्भक्त पूजिल्या देख । सुख अलोलिक मज तेणें ॥१६॥ मद्भक्तांचें झालिया भक्त । त्यांचें सकळ मनोरथ । म्यां पुरवोनियां कृतकृत्य । नित्य निर्मुक्त करीं त्यांसी ॥१७॥

---

शब्दार्थ - १. खऱ्या प्रकारे, २. मिथ्या, ३. नामरूपापलीकडील, ४. उपकारबद्ध, ५. अंकित.

भक्तसंगतीचे महिमान : माझी आवडी ज्यांचे चित्तीं । तिहीं सांडोनि इतर संगाप्रती । करितां भगवद्भक्तसंगती । चारी भुक्ती वोळंगण्या[1] ॥१८॥ सांडोनि इतर संगती । महापापियां नित्यमुक्ती । सनकादिकांच्या निजख्याती । स्वयें गर्जती पुराणें ॥१९॥ ब्रह्मयाची निजांधवृत्ती। उत्तर न देववे पुत्रांप्रती । हंसगीता दावोनि युक्ती । आत्मस्थिती आणिला ॥१२०॥ चोरटा वाल्मीक नारदवचनें । जगद्वंद्य रामभजने । प्रल्हाद वंदिजे पुराणें । अंगीं द्वंद्वें साहणें मी त्यांची ॥२१॥ गर्भी ऐकतां वचनासी । अगाध स्थिती बाणली त्यासी । तुवांचि उद्धरिलें संपातीसी । मधुरवचनेंसीं क्षणमात्रें ॥२२॥ अति गूढ विवरामधीं । हेमा पडली होती बंदीं । तिसी भेटोनि त्रिशुद्धी । निजानंदीं उद्धरिली ॥२३॥ ऐसे आणिक सांगो किती । जग निर्मुक्त सत्संगती । ऐसीं श्रुतिशास्त्रें गर्जती । आणि प्रतीती प्रत्यक्ष ॥२४॥ ऐसें सांगतां रघुनाथा । प्रेम न सांवरे हनुमंता । चरणीं ठेवानियां माथां । मूर्च्छावस्था पडियेला ॥२५॥

सत्संगतीचे माहात्म्य : सत्संगाची निजस्तुती । स्वमुखें करितां रघुपती । आनंदमय त्रिजगती । नित्यनिर्मुक्ती जडजीवां ॥२६॥ आनंद उथळला सर्वांसी । नामें गर्जती अट्टाहासीं । नित्यमुक्ति सत्संगासी । अनायासीं जडजीवां ॥१७॥ योग याग तप साधन । कृच्छ्र[2] अतिकृच्छ्र[2] चांद्रायण[2] । पर्वतपात नलगे जाण । कर्वतभेदन निजमाथां ॥२८॥ ऐशा दुर्जयसाधनस्थितीं । सकळ सांडोनि निश्चितीं । भावें धरितां सत्संगती । जगनिर्मुक्ती सत्संगें ॥२९॥ ऐसें वरदवचनेंकरून । रामें केलें मारुतिपूजन । तेणें जडजीवां उद्धरण । झाले पूर्ण अनायासें ॥१३०॥ याच रीतीं बिभीषण । अनिवार प्रेम दारुण । श्रीराम त्याची बोळवण । स्वानंदें पूर्ण पैं करील ॥३१॥ तें अति गोड निरूपण । देवभक्तांचे प्रेम पूर्ण । एका जनार्दना शरण । रामायण राम वदवी ॥३२॥ धन्य भक्ति बिभीषणाची । धन्य प्रीति श्रीरामाची । बोळवण करितां भक्ताची । प्रेम रामासीं अनिवार ॥३३॥ आज्ञा देवोनि समस्तांसी । रामराज्य अयोध्येसीं । अंती अवघीं नेलीं वैकुंठासीं । सुख सर्वांसीं दीधलें ॥३४॥ शरण एकीं एकनाथा । जनार्दन कृपावंता । रसाळ रामायणी कथा । तुझा वक्ता तूं स्वामी ॥१३५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां हनुमत्प्रेमवर्णनं नाम नवाशीतितमोऽध्यायः ॥८९॥ ओंव्या ॥१३५॥ श्लोक ॥१०॥ एवं ॥१४५॥

## अध्याय नव्वदावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

### बिभीषणाचे लंकेला प्रयाण

रामांनी बिभीषणाला लंकेत जाण्यास सांगितले : तदुपरी[3] दुसरे दिवशीं । सारोनिया[4] नित्यकर्मासी। बैसोनि अंतरसभेसी । बिभीषणासी बोलाविलें॥१॥ सीता आणि त्रिवर्गबंधु । उभे राहिले अति स्तब्धु । मग मांडिला उब्दोधु[5] । बिभीषणालागूनी ॥२॥ बिभीषणासी म्हणे श्रीरघुपती। मज कळली तुझी मनोवृत्ती । आतां असावें अयोध्येप्रती । माझ्या स्नेहा लागोनियां ॥३॥

वचन पाळण्याची परंपरा : तरी लौकिकीं माझी वार्ता । लंका दिधली शरणागता । ते हिरोनि सलोभता । बिभीषण अयोध्ये ठेविला ॥४॥ तरी हें थोर जघन्य[6] । सूर्यवंशा येईन ऊन[7] । स्वर्गी हरिश्चंद्रादि आपण । अधःपतन पावतील ॥५॥ म्हणोनि वचनाकरणें । पूर्वजीं

शब्दार्थ - १. दासी, २. प्रायश्चित्तविशेष, ३. त्यानंतर, ४. करून, संपवून, ५. उपदेश, ६. नीच कृत्य, ७. उणे.

प्राणांत करणें । परी अन्यथा होऊं न देणें । वचन आपुलें सर्वथा ॥६॥ यालागीं म्यां आपण । सोसिलें कष्ट दारुण । चौदा वर्षे वनप्रयाण । तिघीं आम्हीं भोगिलें ॥७॥ आतांही तैसेचि घडेल । परी वचन अन्यथा न होईल । स्वयें ब्रह्मांडही खचेल । तरी अन्यथा करूं न शकें ॥८॥ याचिलागीं पैं जाण । स्वयें शंकरें आपण । करोनियां कोप शमन । त्रैलोक्य जाण रक्षिलें ॥९॥ लंकेश म्हणे श्रीरामासी । कैसें घडलें न कळे मजसीं । कृपा करोनि विस्तारेंसीं । मज प्रीतीसीं सांगिजे ॥१०॥

केवळ तुझ्याकरिता मी त्रैलोक्याचे रक्षण केले असे श्रीराम बिभीषणाला सांगतात : श्रीराम म्हणे रावणवधांती । माझ्या कोपे जळेल त्रिजगती । तंव देव येवोनि काकुळती । श्रीउमापति प्रार्थिला ॥११॥ तेणें येवोनि ते अवसरीं । स्तवोनि कोपातें आंवरी । ते वेळी लक्ष्मण चरण धरी । म्हणे आठवीं वचन आपुलें ॥१२॥ स्वामीनें शरणागता । लंकाराज्य दिधलें तत्वतां । तें होऊं पाहे अन्यथा । विश्वप्रळयीं निमाल्या ॥१३॥ मग कैंची लंका कैंचा बिभीषण । देवांसी मग रक्षील कोण । कृपाब्धि हें वचन । सांग कैसैनि उरेल ॥१४॥ याचि वचना-साठीं । तुजनिमित्तें ब्रह्मसृष्टी । हे जाणोनि राक्षसकिरीटी[1] । लंकागमन करावें ॥१५॥

रामाज्ञेप्रमाणे बिभीषण लंकेला परत जाण्यास तयार होताच रामांनी विश्वकर्म्याला पूर्वीसारखीच लंका सुंदर करण्यास आज्ञा केली : बिभीषण म्हणे श्रीरामासी । आज्ञा वंदोनियां शिर्सी । मी जाईन लंकेसी । प्रयाणवचनासीं स्वामीचिया ॥१६॥ ऐकोनि श्रीराम संतोषला । स्नेहेंकरोनि उचंबळला । बिभीषण पोटेंसीं धरिला । परम भक्त म्हणोनी ॥१७॥ करोनि विश्वकर्म्याचें स्मरण । येरू पातला धरी चरण । श्रीराम म्हणे लंकेशालागून । करीं उपवनें पूर्विल्याऐसीं ॥१८॥ त्रैलोक्याची संपत्ती । आणोनि ठेवीं लंकेप्रती । सांप्रत उद्वस[2] जाहली होती । तें करीं पुन्हां यथास्थित ॥१९॥ दुर्गां करोनि उभवणी । रत्नखचित करीं सुवर्णीं । हाट[3] बिदिया चौबारांनीं । शोभायमान अपूर्व ॥२०॥ राजमंदिरें सर्व । प्रधानादि गृहें अपूर्व । पूर्विल्याहूनि गौरव । शोभावैभव अति रम्य ॥२१॥ अशोकवन करीं बरवें । पुष्पकविमान निर्मावें । मागेल तें पुरवावें । बिभिषणालागूनी ॥२२॥ सुवेळेपुढें रणांगण । रावणासहित रक्षोगण । यांचें झालें पूर्ण कंदन । रक्तमांस धरेवरी ॥२३॥ अस्थींचे झाले डोंगर । वनें झालीं बीभत्साकार । तीं करावीं मनोहर । जैसी पूर्वी होती तैसीं ॥२४॥

बिभीषणाला सर्वतोपरी साहाय्य करण्याची सर्वांना रामांची आज्ञा : बोलावोनी लोकपाळांसी । तुम्हीं सख्य करावें बिभीषणासीं । रावणाघरीं संपत्ती जैसी । त्याहून विशेषीं पुरवावीं ॥२५॥ बोलावोनि अष्टमहासिद्धी । तुम्हीं साह्य व्हावें बिभीषणा आधीं । तुम्हासी सांगतों सद्बुद्धी । स्वहित सिद्ध करावें ॥२६॥ सर्वेचि पाचारिले ऋषिगण । तुम्हीं आशीर्वाद द्यावा संपूर्ण । निकुंभिळेसी करील होम जाण । तो सिद्धी पावावा ॥२७॥ गणपति दुर्गा क्षेत्रपाळांसी । श्रीराम सांगे आदरेंसीं । मनोरथ पुरवावे बिभीषणासीं । कल्पतरुकामधेनूसीं समृद्धि ॥२८॥ प्रार्थोनियां ब्रह्मदेवासी । तुम्हीं कल्पावें राक्षसांसी । पुत्रसुहृदयसंबंधासी । पूर्विल्यापेक्षांही करावें ॥२९॥ रथ गज वाजी अनेक । चतुरंगसेना सकळिक । नाना वाद्यें अलोलिक । लंकेशातें पुरवावी ॥३०॥ (धन) धन्य धान्य खिल्लारें वस्त्रें । उत्तम वास परिकरें । तांबूलसुगंधादि सह परिवारें । बिभीषणासी पुरवावीं ॥३१॥

जग सुखी करावे असा बिभीषणाला रामांचा उपदेश : रावण गेलियानंतर । उणे न दिसावें

शब्दार्थ - १. हे राक्षसराजा, २. ओसाड, ३. बाजार.

अणुमात्र । सुख द्यावें सर्वत्र । लंकापुरवासियां ॥३२॥ श्रीराम म्हणे बिभीषणासी । रावणें पीडिलें त्रैलोक्यासी । तैसे न करावें विश्वासी । करीं जगासी सुखरूप ॥३३॥ हिंसा न करावी सर्वथा । विधिप्राप्त यज्ञ करीं तत्वतां । मानोनियां शास्त्रसंमता । साचारता वर्तावें ॥३४॥ करोनि श्रीशंकरार्चन । देवीचें करावें पूजन । स्मरोनियां नारायण । नित्यावर्ती[1] जाण वर्तावें ॥३५॥ तुज म्हणती राक्षसजाती । परी तुझी नव्हे तैसी मती । जाणोनि माझी प्रकृती । तैसी वर्तणूक करावी ॥३६॥ न करीं अभिचारी कर्म । नाचरावे दुष्ट धर्म । उचित काळ राजधर्म । नित्यावर्ती वर्तावें ॥३७॥

श्रीरामाचे वरदान : राज्यीं न घडे अभिचार । अल्पायुषी नव्हती नारी नर । धन्य होती समग्र । मदनुग्रहेंकरोनी ॥३८॥ उदार होई सर्वशक्तीं । शरण आलिया रक्षीं निश्चितीं । समरांगणीं शौर्यवृत्ती । हें हो तुजप्रती असों दे ॥३९॥ चौदा विद्या चौसष्ट कळा । ज्ञान व्हावें राक्षस-पाळा । हेंही पावसी आता स्वलीळा । ममाज्ञा करोनियां ॥४०॥ करोनि सकळांसी प्रार्थना । पाठविलें स्वस्थाना । देवोनि मंत्रबीजखुणा । सर्व शक्ति जाणा दीधल्या ॥४१॥

लंकेतील आचरण कसे असावे ते श्रीराम सांगतात : मागुती म्हणे बिभीषणासी । प्रतिवर्षी भरवीं यात्रेसी । करोनियां महोत्साहासी । माझे स्थानासी पूजावें ॥४२॥ प्रति इंदुवारी आपण । घ्यावें रामेश्वरदर्शन । पूजा करोनि संपूर्ण । माझें ध्यान करावें ॥४३॥ ऐसा नानापरींच्या युक्ती । शिकवोनि लंकापती । पुढती सांगे अतिनिगुती[2] । स्वात्महितीं रघुवीर ॥४४॥ रावणाचिये घरीं । तुवां रहावें निर्धारीं । स्वपुत्र ठेवावा गृहाभीतरीं । यौवराज्य देवोनियां ॥४५॥ उर्वरित[3] रावणाचिया अंतुरीं[4] । त्या ठेवाव्या इंद्रजिताचे घरीं । सर्वस्व सांभाळावें बरवेपरी । आपुल्या अपत्यासमान ॥४६॥ शुद्ध करोनि कुंभकर्णमंदिर । तेथें ठेवावे माझे चाप शर । त्यांची पूजा करोनि परिकर । नित्य कीर्तनगजर करावा ॥४७॥ शतकोटी रामायण । करावें हें नित्य श्रवण । आपण करोनि माझें मूर्तिपूजन । विश्व लावावें स्वधर्मा ॥४८॥ करावें षडक्षरपुरश्चरण । भूतशुद्धि प्राणप्रतिष्ठा करून । केशवादि मातृका संपूर्ण । दशविध न्यास करावे ॥४९॥ तें बोलिलें अगस्तिसंहितेसीं । आणि अथर्वण उत्तरतापिनासीं । करोनियां यंत्रोद्धारासी । ममार्चनासी करावें ॥५०॥ सिद्धियुक्त चातुर्मास्यादि व्रत । तें बोलिलें वराह-संमत । शयनी बोधिनी व्रतत्रय व्रत । विप्रदीक्षा प्रकटावी ॥५१॥ न करावी निंदा कोणाची । स्तुति येऊं नेदीं इच्छेची । वार्ता नाणीं परांगनेची । स्वप्नीं मातें न विसरावें ॥५२॥

बिभीषणाला द्वीपे, रथ, हत्ती दिले : श्रीरामें धरोनियां पोटेंसीं । बैसविला आपणांपासीं । पाचारोनि शुक्रासी । मग मुहूर्तासी पूसिलें ॥५३॥ येरू म्हणे सुनिश्चित । उदयिक आहे सुमुहूर्त । साधोनियां अभिजित । भोजनयुक्त धाडावा ॥५४॥ याउपरी श्रीरामें । प्रधान बोलविले अनुक्रमें । लंकेसमीप द्वीपें उत्तमें । बिभीषणालागीं दीधलीं ॥५५॥ शत रथ सहस्र हस्ती । तुरंग उत्तम सालंकृती । लंकेशासी विधियुक्ती । अति प्रीतीं दीधले ॥५६॥

श्रीरामांनी जानकीकडून बिभीषणपत्नीची पूजा करवून दोघांची लंकेला पाठवणी केली : जानकीस पाचारोनि रघुनंदन । कानीं सांगोनि वचन । पूजा करोनि संपूर्ण । बिभीषणपत्नी पाठवावीं ॥५७॥ आज्ञा वंदोनि शिरीं । पूजा करोनि यथोपचारीं । वस्त्रालंकारपरिकरीं । शिबिकारूढ पाठविली ॥५८॥ ऐसे रीतीं रघुपती । सिद्ध करोनि लंकापती । सवें देवोनि प्रधान सुमती । लंकेप्रती गमन करावी ॥५९॥ येरीकडे विश्वकर्मा आपण । करोनि लंकेसी गमन । आज्ञेप्रमाणें

शब्दार्थ – १. दररोजच्या क्रमाने, २. फार काळजीने, ३. उरलेल्या, ४. स्त्रिया.

रचोनि पूर्ण । श्रीरामचरण वंदिले ॥६०॥ आज्ञेप्रमाणें आपण । ब्रह्मा रची सृष्टि संपूर्ण । लोकभरोनि विविधजन । अष्टादशवर्ण नांदवी ॥६१॥ तैसेचि येती सकळ । समृद्ध करोनि लंकामंडळ । वंदोनियां भूपाळ । स्वस्थानासी निघाले ॥६२॥

ऋषींना बिभीषणाला राज्याभिषेक करण्याची विनंती : पाचारोनि सकळ ऋषी । अति नम्रत्वें बोले तयांसी । तुम्हीं जावोनि लंकेसी । बिभीषणासी स्थापावें ॥६३॥ माझा बिभीषण आपण । तें माझें निजस्थान । अग्रगणी वैष्णव पूर्ण । मी तयाधीन सर्वस्वें ॥६४॥ ऐसे राहविले एक मास । प्रत्यहीं[1] आदराचा विलास । आनंदें करोनि समरस । परस्परें स्नेहेंकरोनी ॥६५॥

नित्योत्सव : प्रात:काळीं श्रीरामचरण । देखती डोळेभरी पूर्ण । मध्यान्हीं करोनि शरयू-स्नान । पंक्तीं भोजन यथारुचि ॥६६॥ सायंकाळीं रघुनंदन । देखतां आनंदें नीराजन । भाट गर्जती संपूर्ण । श्रीरामगुण वाखाणिती ॥६७॥ प्राप्त झालिया निशी[2]। यथाविधि सुमन-चंदनासीं । शय्याविधीची उपमा कैसी । ब्रह्मसदनासीं समानत्वें ॥६८॥ एके दिवशीं वनक्रीडेसी । जाऊनि करिती सहपरिवारेंसीं । तैसेंचि राजगृहीं संभ्रमेंसीं । अति आनंदेंसीं भोगिती ॥६९॥ सर्वेचि येती गोपुरासी । मग पाहती गजयुद्धासी । रचून सकळ सैन्यासी । निशीं अग्नियंत्रासी दाविती ॥७०॥ राजगृहीं तांबूलसन्मान । मग पावती आपुलें स्थान । भोग भोगिती संपूर्ण । जे रघुनंदन निर्मिले ॥७१॥ गंधर्व येती घरासी । नानापरी दाविती कर्मासी । लाहोनि यथोचितासी । मग सेजेसी पहुडती ॥७२॥ तेथें येवोनि उर्वशींचें शत । सेवेलागीं तिष्ठत । परी त्यांचें मन नव्हेचि कामासक्त । कीं हरिभक्त म्हणोनी ॥७३॥ ऐसा करितां गदारोळ । आनंदें भरिला भूगोळ । कीर्ती स्फुटों पाहे दिङ्मंडळ । राम रायाचेनि धर्में ॥७४॥ सुखरत सर्व अहोरात्र । काळ पळे झोकोनि नेत्र । इतराचा लेखा[3] किंमात्र । श्रीरामराज्य करितां स्वामी ॥७५॥ देव येवोनि तेहतीस कोडी । करीं धरोनि कुरवंडी । गावोनि सांडिती रामरायाची प्रौढी । मग ओवाळोनि सांडिती ॥७६॥ होतां अरुणोदय प्राप्त । स्तुतिवादें बोधिती श्रीरघुनाथ । प्रतिपाळीं विश्व समस्त । प्रातर्बोध करिते झाले ॥७७॥ मग उठोनि सकळांसी । शौचविधी यथान्वयेंसीं । घालोनियां मृद्रासनासी । मूर्ति ध्यानासी अणिती ॥७८॥ येवोनि सकळ जन । घेती श्रीरामदर्शन । मग करोनि शरयूस्नान । संध्याहोम संपादिती ॥७९॥ करोनि देवतार्चन । घेवोनि वस्त्रें भूषण । परस्परें अर्पोनि सुमन चंदन । राजद्वारा जाण स्वयें येती ॥८०॥ काय वानूं हाटवटिया । जाणों मूर्तिमंत निधी ठेलिया । किंवा वोळंगणे[4] आलिया । सकळ संपत्ती समवेत ॥८१॥ अंतरसभा विसर्जून । बाहेरी आला रघुनंदन । तंव वानिती बंदिजन । अति पुरुषार्थ चार ते ॥८२॥ ऐसा नित्यानित्य उत्साव । करिता झाला रामराव । आनंदाचा गौरव । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥८३॥ यापरी बिभीषण एकांतीं । प्रबोधोनि बहुतां युक्ती । आणोनि कौसल्येप्रती । चरणावरी घातला ॥८४॥

बिभीषणाचे कौसल्यादि मातांना वंदन व मातांचे त्याला आशीर्वाद : माता म्हणे बिभीषणासी । तूं माझा रामाचा सखा होसी । मग देवोनि आशीर्वचनासी । सुमित्रे कैकयीसी भेटविला ॥८५॥ सात शतें माता समस्त । डोळां पाहती सुग्रीव लंकानाथ । सकळांसहित हनुमंत । त्रिजगतींत तत्सम असेना ॥८६॥ चौघी सुना येवोनि ते वेळीं । पाहती बिभीषण वानर-मंडळीं । हाडपियां[5] करीं तांबोली । देवोनियां धाडिले ॥८७॥ सभेसी येती ऋषिगण । देवोनि वेदोक्त आशीर्वचन । येरीं देवोनि सन्मान । समीप जाण बैसविले ॥८८॥

---

शब्दार्थ - १. प्रतिदिशीं, २. रात्र, ३. पाड, ४. शरण, ५. विडा देणाऱ्यांच्या.

**रावणवधाचे प्रायश्चित कोणते घ्यावे असा रामांचा ऋषींना प्रश्न :** श्रीराम पुसे तयांसी । विनंती आहे मानसीं । मज सांगावें निश्चयेंसीं । धर्मनीतीसी अनुकूल ॥८९॥ आम्हीं मारिला रावण । तरी हें तंव देवकार्य जाण । तरो पावला कृतकल्याण । परी दूषण तें आम्हां ॥९०॥ हा विधात्याचा पणतू । पौलस्तीचा सुतू । ब्राह्मणोत्तम निश्चितू । सकळ वेदार्थू जाणता ॥९१॥ यासी मारिलें समरांगणीं । दोष नाहीं क्षात्रधर्मालागूनी । तथापि स्वामींच्या वचनीं । अति विश्वास आमुचा ॥९२॥ तरी आतां यथार्थ । वदावें जी प्रायश्चित । ते करोनि विधियुक्त । धर्मस्थापन करावें ॥९३॥ तंव बोलती ऋषीश्वर । पुससी गौरवोनि विचार । तूं सकळांचा ईश्वर । कृपाकर आमुतें ॥९४॥

**शिवलिंग स्थापना करावी, विप्रांना वर्षासने द्यावीत असे ऋषींनी सांगितले :** तरी आता ऐसें कीजे । स्थलमाजीं लिंग प्रतिष्ठिजे । तीर्थस्थापन करविजे । संपादिजे शिवार्चा ॥९५॥ कृष्णा गोदा भागीरथी । उभयतीरीं लिंगप्रतिष्ठा निश्चिती । येणें ब्रह्महत्येची निर्मुक्ती । वेदप्रयुक्ती बोलिली जे ॥९६॥ आणिक एक असे कारण । ब्राह्मणांसी द्यावें अग्रहार[१] दान । पत्र द्यावें वर्षासन । पृथ्वी शशि सूर्य जंव आहे ॥९७॥ वंदोनि ऋषींचे चरण । करोनि चरणक्षाळण । भक्तियुक्त करोनि पूजन । मग स्वाश्रमा जाण धाडिले ॥९८॥

**त्याप्रमाणे करण्याची प्रधानांना रामांची आज्ञा :** आज्ञा करोनि प्रधानासी । एक भाग देवांसी । दुजा भाग द्विजांसी । तिजा राज्यासी चालवीं ॥९९॥ आज्ञेप्रमाणें शिवालयें । लिंगप्रतिष्ठा यथान्वयें । संपादोनि शीघ्र मजप्रति ये । सुखवार्ता सांगावया ॥१००॥ आज्ञा वंदोनि शिर्शीं । वंदोनियां भरतासी । मुद्रा[२] लाहोनि[३] पत्रासी । मग दूतासी धाडिलें ॥१॥ चमत्कारें करोनि नमन । आज्ञेप्रमाणे संपादून । त्रिमासांत पातले गण । श्रीरामचरण वंदावया ॥२॥ तडीतापडी[४] संन्यासी । योगी बैसले योगाभ्यासीं । त्यांची वार्ता आणोनि मानसीं । यथोपचारांसी पाठविलें ॥३॥ अंधपंगु हीन अंगें । दरिद्रें पीडिले वातयोगें । गृहअन्नवस्त्र-संयोगें । अति स्नेहें रक्षिले ॥४॥ भरतासी म्हणे श्रीराम । राज्यभार चालवीं निःसीम । जे असेल दुर्जय दुर्गम । तें मजप्रति नेमें सांगावें ॥५॥ त्यानंतर सभाविसर्जन । सवें बिभीषणात्मज घेऊन । मग पातला जानकीभुवन । परिचारकजनसमवेत ॥६॥ अंतगृहा नेवोनि त्यासी । भेटविलें जानकीसी । तिणें अर्पून कंठाभरणासी । स्वाश्रमासी धाडिलें ॥७॥ भरतें येवोनि भद्रासीं । पाचोरोनि सर्व प्रधानांसी । आज्ञा नेमी समस्तांसी । प्रति सभेसी शीघ्र यावें ॥८॥ उदयीक सकळांसी प्रयाण । स्वयें करवील रघुनंदन । सदन्नें करोनि निर्माण । सिद्ध करणें उपचारातें ॥९॥ श्रीरामसंकेतलाघवता । निर्माण करावें चौं पुरुषार्थां । जे जे अपेक्षा ज्याचे चित्ता । त्या त्या पदार्था पुरवावें ॥११०॥ एका जनार्दना शरण । झालें बिभीषणा समाधान । पावोनियां रामवरदान । राजनीति जाण संपादिली ॥११॥ हें बिभीषण आख्यान । कर्ता श्रीगुरु आपण । तेणेंचि संपवूनि निरूपण । अकर्तेपणें राहिला ॥११२॥

**स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां बिभीषणप्रयाणं नाम नवतितमोऽध्यायः ॥९०॥ ओंव्या ॥११२॥**

---

**शब्दार्थ -** १. इनामे, २. मोहोर, ३. जोगी, गोसावी.

# अध्याय एक्याण्णवावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥

वानरांचे स्वस्थानी निर्याण

**सिंहासनाधीश श्रीरामांचे वर्णन :** तदुपरी[1] दुसरें दिवशीं । करोनियां प्रातःस्नानासी । वंदोनियां महेशासी । भद्रपीठासी श्रीराम आला ॥१॥ सभा झाली घनदाट । प्रत्यया न ये वैकुंठ । आपण येथींचा महिमा उद्भट । डोळा स्पष्ट विश्व देखे ॥२॥ अंकीं बैसवोनि जानकीसी । आपण बैसला सिंहासनासीं । घेवोनि भरत प्रधानासी । बंधुत्रयेंसीं नमिता झाला ॥३॥ सुमंत धरी छत्रातें । राष्ट्रवर्धन धरी व्यजनातें[2]। धर्मपाळ आतपत्रातें[3]। धरितां झाला ते काळीं ॥४॥ भरत चरणीं निकट । यौवराज्य लाहोनि उत्कृष्ट । नम्रपणें बोले चोखट । राजनीतिलागूनी ॥५॥ धनुष्य खड्ग हातीं धरून । सव्यभागीं[4] लक्ष्मण । उभा राहोनि विचक्षण । स्वामि आज्ञापन वंदिता झाला ॥६॥ शत्रुघ्न आपण सेनानी । हातीं वेत्र धरोनि अनुदिनीं । रामसंकेतालागूनी। नमस्कारा तिष्ठत ॥७॥ ब्रह्मादिक देवगण । आरूढोनि दिव्य विमान । समीप बैसले ऋषिगण । जे भविष्यार्थ जाणते ॥८॥ ऐसी सभेची थोरी । राबती अष्टमहासिद्धि द्वारीं । कल्पतरु चिंतामणींच्या हारी । आदिकरोनि तिष्ठती ॥९॥ गंधाक्षता सुमनमाळा । अर्पिती अपूर्व परिमळा। क्षणक्षणां देती तांबूला। दिव्य सोहळा काय वानूं ॥१०॥ श्रीराम सालंकृत । कृपादृष्टी पाहे भरत । नेत्रसंकेत मनोगत । जाणोनि यथोक्त आरंभिलें ॥११॥ षोडशदानें द्विजांसी । वस्त्रें दिधलीं भाटांसी । उर्वशीआदि कामिनींसी । अति उल्लासीं पूजिलें ॥१२॥ नारद तुंबर आणि गंधर्व । नागरिक लोक अपूर्व । चौसष्टीकळालाघव । अति मनोहर दाविते झाले ॥१३॥ चारी वेद मूर्तिमंत । सहाही शास्त्रें बोलत । अष्टदश पुराणें वल्गेजत । उपपुराणें गर्जत नानापरी ॥१४॥ सकळ सभा आनंदेसीं । देखती झाली श्रीरामासी । संकेत करोनि बिभीषणासी । मग तयासी पुढें केलें ॥१५॥ तयाउपरी राजे समस्त । नमस्कारा उभे सभेआंत । कर जोडोनि तटस्थ । विनीतवत बोलती ॥१६॥ वानर म्हणती श्रीराघवा । आनंदें भूगोल भरला आघवा । जैसा उदेलिया शशी बरवा। भरितें[5] भरे समुद्रातें ॥१७॥ हा दृष्टांत एकदेशी । बोलतां न ये उपमेसी । तूं अंतरात्मा होसी । सर्व जाणसी मनोगत ॥१८॥ ऐसें परिसोनि कपींचें उत्तर। सर्वथा संतोषला श्रीरघुवीर। मग बोलिला प्रत्युत्तर । समस्तांसी सभेप्रती ॥१९॥

**श्रीरामांचे ऋणस्मरण ऐकून वानरांना आनंद :** म्हणे मी तुमचे उपकारऋणें । बांधिलों अवतारीं येणें । उत्तीर्णतापदार्थ[6] जेणें। व्हावया सर्वथा न दिसे ॥२०॥ तरी तुम्ही काया वाचा मनसा। स्त्रीपुत्रांची धरिली नाहीं दुराशा। सांडोनि जीवाची आशा। साह्य सहसा झालेति मज ॥२१॥ ऐकोनि श्रीरामवचनासी । आनंद झाला सकळांसी । जीवें ओंवाळोनि मानसीं । प्रीतिवचनासी मांडिलें ॥२२॥ दाटलें बाष्प जळ लोचनीं । सद्गद बोलती वचनीं । तया प्रेमालागूनी । ब्रह्मपद ओंवाळिजे ॥२३॥ तुझिया चरणांपरतें । नलगे आम्हां सायुज्य तें । परी न भोगितां प्रारब्धातें । केंवी येथे राहूं शकों ॥२४॥ स्वामीवांचोनि अन्यथा । तिळभरी जरी दूर होतां। प्राण जाऊं पाहे तत्वतां। वचन सर्वथा मानिजे ॥२५॥ आत्मा सकळांहि जाण । आदिकरोनि दानपुण्य । परी तुझ्या वियोगाचें दुःख दारुण। सर्वथा जाण सोसवेना ॥२६॥ श्रीराम म्हणे

---

शब्दार्थ – १. त्यानंतर, २. चवरी, ३. छत्र, ४. उजव्या बाजूला, ५. भरती, ६. उपकाराच्या फेडीची गोष्ट.

सकळांसी । मी आहें तुम्हांपासीं । तिळभरी न विसंबें अहर्निशीं । वचन सकळांस मानले ॥२७॥ आपण सकळांचा आत्मा । म्हणोनि मस्तकीं ठेवी हस्तपद्मा[1] । निरसोनियां आम्हां तुम्हां । जाणवी निजखुणा लाघवी ॥२८॥

सुग्रीवाने आपल्या राज्याला जाण्याची आज्ञा मागितल्यावर भोजनप्रसाद घेऊन जावे असे रामांचे सांगणे : सुग्रीव राजा आपण । प्रार्थी श्रीरामा कर जोडून । आज्ञा झाल्या संपूर्ण । स्वराज्या आपण जाऊं स्वामी ॥२९॥ आतां स्वामींनी राज्य कीजे । आम्हां रंकांलागीं आज्ञा दीजे । ऐसें ऐकतां रघुराजें । तांबूल अर्पिजे समस्तां ॥३०॥ श्रीराम म्हणे सकळांसी । दध्योदन करोनि भोजनासी । मग जावें स्वराज्यासी । अक्षय सुखासी पाविजे ॥३१॥ आज्ञा वंदोनि माथां । माध्यान्हिक सारोनि तत्वतां । बिभीषण सुग्रीव वाळिसुता । पंक्तीं तत्वतां बैसविलें ॥३२॥ वसिष्ठादि ऋषिगण । आपण बंधु सहप्रधान । तिघी माता गुणसंपन्न । समीप आणून बैसविल्या ॥३३॥ वाढिती झाली कुशध्वजसुता । घृत वाढी सुमेधा पतिव्रता । दधि वाढी सौमित्रकांता । आदरें तत्वतां जानकी पाहे ॥३४॥ नाना अन्नें परवडी । काय वानूं तेथींची गोडी । ब्रह्मादिक वर्णिती प्रौढी । शंकरादिकां दुर्लभ ॥३५॥ पवित्र शरयूचें जळ । माजी मिश्रित सुपरिमळ । तें सेवितां सुख केवळ । पावे सुकाळ स्वानंदाचा ॥३६॥

इच्छा असेल ते मागून घ्या असे रामांनी वानरांना सांगताच, पुढच्या कृष्णावतारात आमची तृप्ती करावी अशी सर्वांची प्रार्थना : याउपरी श्रीराघुवीर । बोलिला प्रीतीचें उत्तर । म्हणे ज्यासी जो इच्छाआदर । तो मागणें प्रकार ममाज्ञा ॥३७॥ तंव बोलती मधुरवाणी । आर्जींची तृप्ति अनंत गुणी । परी उरी[2] असे किंचित मनीं । ते परिसा श्रवणीं स्वामिनाथा ॥३८॥ दहिभात स्वइच्छेकरीं । भोजन करावें यमुनातीरीं । कां जें अवतरणें द्वापरीं । कृष्णावतारीं स्वामिया ॥३९॥ वचन ऐकोनि श्रवणीं । हांसे आलें जानकीलागूनी । कोण भूषण गौळपणीं । वत्सराखणी[3] स्वामीतें ॥४०॥ भक्तां क्षणाक्षणाधीन देव । स्वामित्वाचें हेंचि लाघव । ऐसा जाणोनि मनोभाव । श्रीरामराव हांसले ॥४१॥ श्रीराम म्हणे तथास्तु । पुरती तुमचे मनोरथु । तुमचे पंक्ती मी कृतार्थु । बहु काय अर्थु अनुवादों ॥४२॥

भोजनोत्तर सर्वांना तांबूलदान : असो ऐसीं भोजनें झालीं । सकळीं उत्तरापोषनें घेतलीं । उष्णोदकें सिद्ध होतीं ठेविली । तेणें सकळ आंचवले ॥४३॥ शुद्धाचमनें घालीं सकळांसी । शीतळोदकें देवोनि प्राशनासी । मग तुळसी देवोनि सर्वांसी । मुखशुद्धीसी दीधलें ॥४४॥ देवोनि गंध सुमन । राजोपचार परिमळपूर्ण । तांबूल देवोनि संपूर्ण । सभेस जाण बैसविलें ॥४५॥ वीणासंकीर्तनगजरें । भाट गर्जती कैवारें । स्वानंदें लागलीं मंगळतुरें । उपमे न सरे सत्यलोक ॥४६॥

नंतर सुग्रीवाला मुकुट देऊन निरोप दिला : तदुपरी श्रीराम आपण । मुकुट सुग्रीवासी देऊन । बहुत करोनि सन्मान । किष्किंधेसी जाण धाडिला ॥४७॥ ते समयीं सुग्रीवें आपण । दृढ धरिले श्रीरामचरण । मस्तकीं लाहोनि वदरदहस्त पूर्ण । प्रीतिकरोन अति नम्र ॥४८॥ श्रीराम म्हणे तुझ्या उपकारा उत्तीर्ण । तुळितां मेरुमांदार तृण । क्षणक्षणां आठवीं तुझे गुण । सखा संपूर्ण तूं माझा ॥४९॥ सव्य घालोनि सर्व सभेसी । सुग्रीव निघे वानरभारेसीं । श्रीराम म्हणे स्मरण मानसीं । असों द्यावें सर्व काळ ॥५०॥ उपरी अंगद कर जोडूनी । सन्मुख उभा राहूनी । बोलता झाला प्रीतिकरोनी । मधुरवचनीं अनुवादे ॥५१॥ म्हणे स्वामी तुझे कृपेंकरून ।

---

शब्दार्थ - १. वरदहस्त, २. बाकी, शिल्लक, ३. गाई राखणे.

जन्ममरणावेगळें होणें । त्या तुज विसरोनि काय जिणें । निंद्य होणें जगामाजी ॥५२॥

**अंगदाचा सत्कार करून त्याला प्रेमाचा निरोप दिला :** ऐसें अनुतापाचें बोलणें । संतोष मानिला रघुनंदने । मग अर्पूनियां भूषणें । अंगद पूर्ण शोभता झाला ॥५३॥ तुज न विसरिजे हें सुख । तुज न विसरिजे तें दुःख । भोगावया कोण मूर्ख । जो जन्मांध देख पृथ्वीवरी ॥५४॥ श्रीराम म्हणे वाळिआत्मजा[1]। तूं आलासि माझिया काजा । आतां जाइजें निजवोजा । युवराजा किष्किंधे ॥५५॥ ऐसी रघुराज आज्ञा देत । अष्टादशक्षोणींसमवेत । सव्य घालोनि वैदेही-कांत । नामें गर्जत चालिला ॥५६॥

**जांबवंत, कुमुद, रंभ, शरभ या प्रमुख वानरसेनानींचा सत्कार करून त्यांना प्रेमाचा निरोप :** यानंतरें ऋक्षाधिपती । जांबवंत करी विनंती । म्हणे स्वामी बहुतां रीतीं । सांभाळिलें मजलागीं ॥५७॥ आतां आज्ञा वंदोनि शिरीं । प्रयाण करूं सहपरिवारीं । श्रीरामें तये अवसरीं । बहु सन्मान दिधला ॥५८॥ रत्नखचित कवच । आणोनि अर्पिला साच । येरु म्हणे संतोष झाला उंच । मेरूपरीस सन्मानें ॥५९॥ परस्परें संकेत । श्रीराम म्हणे फळती[2] मनोरथ[2] । स्यमंतहरणीं पावसी निश्चित । द्वापर[3] प्राप्त झालिया ॥६०॥ ऐसी श्रीरामाची आज्ञा । मानिली जांबवंतें संज्ञा । मग मस्तकीं वंदोनि आज्ञा । कोटि ऋक्षेंसीं[4] निघाला ॥६१॥ पुढें कुमुदनामा वानर । श्रीरामासी करी नमस्कार । येरीं हृदयीं धरोनि गौरव थोर । वीरांमाजी अति श्रेष्ठ ॥६२॥ संतोषोनि श्रीराम । जो अवाप्तपूर्णकाम[5] । उचिता येवोनि उचितोत्तम । हार मुक्तलग दिधला ॥६३॥ उचित देखोनि तत्वतां । न माये गगनीं सर्वोत्कर्षता । सव्य घालोनि सीताकांता । शतसहस्रें कोटींसीं निघाला ॥६४॥ विंध्याचळीं वास्तव्य ज्याचें । रंभ ऐसें नाम जयाचें । तेणें स्तुति करोनि रघुनाथाचें । मन अत्यंत तोषविलें ॥६५॥ उचिता येवोनि रघुनायक । दिधला रत्नखचित टिळक । माथां ठेवोनि अभयहस्तक । अति संतोषें धाडिला ॥६६॥ येरु हर्षे उचंबळला । सव्य घालोनियां भूपाळा । सरिसा सपरिवार चालिला । त्रिदशकोटींसमवेत ॥६७॥ यापरी कपि शरभु । स्तविता झाला अयोध्याप्रभु । उचिता येवोनि कौस्तुभु । प्रीती करोनि दिधला ॥६८॥ उचितानंदाचा सोहळा । सुख भरलें भूपाळा । सवें नव लक्ष गोळांगूळां । निघाला सव्य घालोनी ॥६९॥ विनीत वानर याउपरी । श्रीरामाची स्तुति करी । म्हणे परा पश्यंती मध्यमा वैखरी । बोलतां वाचा पारुषली[6] ॥७०॥ तो तू अमूर्त मूर्तिमंत । भक्तजनांलागीं कृपावंत । ऐसें बोलतां विनीत । स्वयें रघुनाथ तोषला ॥७१॥ बहु भूषणें रत्नखचित । विनीतासी अर्पी सीताकांत । सव्य घालोनी हर्षयुक्त । साठी शतसहस्रेंसीं निघाला ॥७२॥ कृच्छ्र कपि अगाध बळी । रामासन्मुख बद्धांजळी । स्तुति परिसोनि ते काळीं । आत्माराम संतोषला ॥७३॥ पदक काढोनि घातलें कंठीं । येरु सव्य घालोनि उठी । घेवोनि वानर तीन कोटी । उठाउठीं चालिला ॥७४॥ पुढें प्रमाथिनामा महामारी । तेणें स्तविला श्रीराम भारी । उचित दिधलें अवधारीं । कटिसूत्र जडिताचें ॥७५॥ तेणें उचिताचेनि हर्षे । गर्जत नामाचेनि घोषें । पन्नास सहस्र एक लक्षें । सहपरिवार चालिला ॥७६॥ याउपरी गवयनामा । स्तुतीं तोषविलें श्रीरामा । उचिता दिधलें प्लवंगमा । जडित उत्तरी कंठींची ॥७७॥ उचितें हर्ष झाला थोरू । सव्य घोलोनि श्रीरघुवीरू । सप्तकोटी परिवारू । कपींसमवेत चालिला ॥७८॥ यानंतरे वानर गज । तेणें स्तविला रघुराज । उचित दे महाराज । जो आत्मज

---

शब्दार्थ - १. वालिपुत्रा, २. इच्छा तृप्त होतील, ३. द्वापर युगात, ४. अस्वलांसह, ५. सर्व इच्छा पूर्ण झालेला, ६. अडखळली.

कौसल्येचा ॥७९॥ कंकण जडित हातींचें । काढूनि त्वरित दिधलें साचें ! श्रीराम बोले निजवाचे । आतां न विसरें मजलागीं ॥८०॥ येरु मस्तक ठेवोनि भूमीसीं । तुज न विसंबें जीवेंसीं । सर्वे वानर तीन लक्षेंसीं । सव्य घालोनि निघाला ॥८१॥ ऋक्षयातीचा प्रघसनामा । तेणें स्तविलें गुणग्रामा । कंठींची मेखळा उत्तमोत्तमा । तया दिधली संतोषें ॥८२॥ याउपरी सनातन कपी । दोघे बळी दीर्घप्रतापी । तिहीं स्तविला धर्मरूपी । मधुर स्तुती करोनियां ॥८३॥ स्तुति ऐकोनियां तत्वतां । पायींचा तोडर दिधला उचिता । येरु चालिला सत्वरता । सव्य घालोनि श्रीरामा ॥८४॥ ऋषभनाभा बळवंत । कर जोडोनि स्तवन करीत । उचित देवोनि सीताकांत । वांकी देत चरणींची ॥८५॥ दुर्मुखनामा याउपरी । स्तवोनि संतोषविला रावणारी । उचित दिधलें झडकरी । जडित कमळ हातींचें ॥८६॥ सुमुख कपि यानंतर । स्तुतिअनुवादें जोडोनि कर । म्हणे चाड नाहीं अलंकार । स्मरण देई आपुलें ॥८७॥ विचार पडला रघुनायका । मग उचिता दिधल्या रत्नपादुका । येरें ठेवोनि मस्तका । सव्य घालोनि निघाला ॥८८॥ उचितें आनंद न समाये जगीं । सव्य घालोनि श्रीरामा वेगीं । निघता घाला ऊर्ध्वमार्गीं। सभालोकीं संतोषिजे ॥८९॥ हें ऐकोनि श्रीरामा । उचित हे अंगुष्ठमुद्रा उत्तमा । सर्वदा देखसी मज समा । प्रपंचोन्मुख[1] असतांही[1] ॥९०॥ मग तुकावोनि[2] माथा । कोटिदळेंसीं उत्तरपंथा । सव्य घालोनि रघुनाथा । त्वरान्वित चालिला ॥९१॥ याउपरी गवाक्षज झाला बोलता । कृपा असों दे रघुनाथा । सेवा लाहोनि पूर्णता । जे ब्रह्मादिकां दुर्लभ ॥९२॥ याउपरी सर्वोत्तमें । उचिता देणें श्लाध्यधर्मे । जें जें आहे परम दुर्गमे । जें देणें लागे दशमुद्रें ॥९३॥ तेणेंकरोनि जाण। पावलें श्रीरामाचें ध्यान । मग करोनियां नमन । पूर्वमार्गी चालिला ॥९४॥ याउपरी कपि नळ । तेणें स्तविला घननीळ । उचित देवोन अंदुखळाळ[3] । स्नेहानंदें गौरविला ॥९५॥ नळें वंदोनि झडकरी । मस्तक ठेविला पायांवरी । अति हर्षें निजगजरीं । अग्निदिशे[4] चालिला ॥९६॥ सर्वे एक पद्म दळ । घेवोनि चालिला आतुर्बळ । सव्य घोलोनि नृपाळ । जो भूपाळ अयोध्येचा ॥९७॥ यानंतरें नीळ मधुरोत्तरीं । नरेंद्राची स्तुति करी । येरें काढोनि भागवती[5] करीं । त्याचे हातीं दिधली ॥९८॥ सव्य घालोनि सभास्थान । गर्जत चालिला त्वरेन । सर्वे घेवोनि सर्व सैन्य । श्रीरामगुण वर्णित ॥९९॥ यानंतरें सुषेण । वंदोनि श्रीरामचरण । होवोनियां हर्षायमान । नामगर्जन करीत ॥१००॥ श्रीराम म्हणे तूं प्राणदाता । उचित न दिसे पदार्था । कवण्या द्यावें अर्था । लक्ष्या सर्वथा न येचि ॥१॥ तथापि एक असे मनीं । म्हणोनि काढिला कंठींचा मणी । देवोनि सुषेणालागूनी । अति प्रीतीनें धाडिला ॥२॥ एक सर्व सेना घेऊन । सुषेण चालिला आपण । वंदोनियां सीतारमण। अति हर्षोन चालिला ॥३॥ म्हणे तुझे दृष्टी-पुढें । मृत्यु पळेल बापुडें । रोगिया गणना केंवी घडे । ऐसें वदे रोकडें श्रीराम ॥४॥ यानंतरें मैंद कपि जाण । स्तविता झाला रघुनंदन । येरू म्हणे तूं सखा पूर्ण । येथें अनुमान असेना ॥५॥ उचिता येवोनि आपण । अर्पिले तुजलागीं सिंहासन । हेचि करीं माझे पूजन । सर्वही श्रेय[6] जाण पावसी ॥६॥ एक शंख घेवोनि सेना । वंदोनिया रघुनंदना । सव्य घालोनियां जाणा । करित गर्जना चालिला ॥७॥ हिमवंत करी स्तुती । सार्वभौमा मंगलमूर्ती । तेणें आनंदला रघुपती । देवोनि रत्नमूर्ति गौरविला ॥८॥ मग घेवोनि दहा क्षोणी

---

शब्दार्थ - १. प्रपंचात असूनही, २. हालवून, ३. भूषणविशेष, ४. आग्नेयीला, ५. बलवान, ६. कल्याण.

सेना । सव्य घालोनि रघुनंदना । त्वरें चालिला जाणा । वायव्यकोणालागूनी ॥९॥ ज्योतिर्मुख याउपरी । श्रीरामाची स्तुति करी । उचित तया झडकरी । रत्नप्रावरण दिधलें ॥११०॥ नमस्कारोनि राघवातें । सेना घेवोनि एक कोटीतें । सव्य घालोनि रघुनाथातें । उल्लासित चालिला ॥११॥ केसरी नाम कपि जाण । येवोनि घाली लोटांगण । त्यासी देवोनि बाहुभूषण । अति गौरवून धाडिला ॥१२॥ सर्वे घेवोनियां निजसेना । अक्षौहिणी गणना । वंदोनियां श्रीरामचरणां । करित गर्जना चालिला ॥१३॥ हेमकूट त्यानंतर । स्तुति करोनि अत्यादर । चुंबोनि श्रीरामचरण परिकर । निढळीं सत्वर लाविलें ॥१४॥ तये समयीं उचित । पावला कौस्तुभ झळझळित । वंदोनियां सीताकांत । शतकोटी कपींसहित चालिला ॥१५॥ याउपरी वानर खेद नाम । स्तुति वदे सर्वोत्तम । संतोषोनि देवोत्तम। दे क्षुद्रघंटिका कंठींची ॥१६॥ आज्ञा देतां सीतारमण । सर्वे घेवोनि सात क्षोणी सैन्य । सव्य घालोनि रघुनंदन । हास्यवदन चालिला ॥१७॥ गंधमादन आणि दधिमुख । उभे राहिले श्रीरामासन्मुख । जीवें ओंवाळुनि श्रीमुख । मस्तक चरणीं ठेविती ॥१८॥ अभयहस्त ठेवोनि माथां । देत आशीर्वाद तत्वतां । विजयी तुम्ही अक्षयता । श्रीरघुनाथाचेनि धर्मे ॥१९॥ समस्तांसी श्रीरघुवीर । कोणा अलंकार कोणा वस्त्र । गौरवोनियां वानर । अति त्वरें बोळवीत ॥१२०॥ ऐसे बोळवोनि वानरगण । सुख पावोनि संपूर्ण । एका जनार्दना शरण । रम्य रामायण अति गोड ॥२१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां वानरनिर्याणं नाम एकनवतितमोऽध्यायः ॥९१॥ ओंव्या ॥१२१॥

## अध्याय ब्याण्णवावा

॥ श्रीसद्गुरुरामचंद्राय नमः ॥



श्रीरामचरित्र

**श्रीरामसभेचे वर्णन :** यानंतरें दुसरे दिवशीं । करोनियां प्रातःस्नानासी । वंदोनियां महर्षीसी । भद्रपीठासीं श्रीराम आला ॥१॥ सभा बैसली घनदाट । दुजें उपमेसी वैकुंठ । तेथींचा महिमा उत्कट । अति श्रेष्ठ रामसभा ॥२॥ अंकीं घेवोनि जनकनंदिनी । श्रीराम बैसला सिंहासनीं । येवोनि भरतादि प्रधानीं । लोटांगणीं वंदिला ॥३॥ छत्र धरिलें सुमंतें । अकोपन धरी चामरातें । राष्ट्रवर्धन धरी व्यजनातें[1]। आतपत्रातें[2] धर्मपाळ ॥४॥ रामचरणांनिकट भरत । उभा राहे जोडोनि हात। तो युवराजा अति विख्यात। नम्र विनीत भावार्थी ॥५॥ हातीं धरोनि धनुष्यबाण। सव्य भागीं लक्ष्मण । उभा राहोनि विचक्षण । श्रीरामचरण लक्षित ॥६॥ शत्रुघ्न आणि सेनानी । वेत्र[3] निजहस्तें धरोनि । उभे राहिले रघुनंदनीं । लक्ष ठेवोनी निजचित्तें ॥७॥ सुग्रीवादि

---

**शब्दार्थ -** १. पंखा, २. अबदागिर, ३. राजदंड.

बिभीषण । उभे राहिले कर जोडून । सन्मुख तिष्ठे वायुनंदन । जिवलग पूर्ण श्रीरामाचा ॥८॥ वेद होवोनियां भाट[1] । वर्णित श्रीरामप्रताप श्रेष्ठ । साही शास्त्रें घडघडाट । स्तुति उद्भट वानिती ॥९॥

श्रीराम सगुण की निर्गुण : एक म्हणती राम सगुण । एक म्हणती राम निर्गुण । दुजा म्हणे न कळे खूण । रामम चिद्धन एकला ॥१०॥ तिजा म्हणे राम एकला । तरी कां बहुरूपें भासला । चौथा म्हणे न कळे तुला । तोचि झाला निजांगें ॥११॥ ऐसें ऐकोनियां वचन । एक म्हणे हें बहुभाषण । राम अविकारी निर्गुण । त्यासी आन न म्हणावें ॥१२॥ रामें विश्वाभास केला । आम्ही मानूं या बोला । परी रामचि विश्व झाला । यया बोला न मानूं ॥१३॥ गारुडी युक्ति मंत्रकळा । करोनि वादीचा सर्प केला । कीं गारुडी सर्प झाला । म्हणतां जनाला मानेल ॥१४॥ घट कुलालें[2] निर्मिला । कीं कुलालचि घट झाला । तैसा रामें प्रपंच रचिला । कीं रामचि झाला प्रपंच ॥१५॥ माळियें देवोनि जीवन । स्वयें वाढविलें उपवन । कीं तो जाहला आपण । ऐसें सांगोन मज द्यावें ॥१६॥ तुम्हांसी नाहीं पूर्ण ज्ञान । वृथा बोलाचें वल्गन । निर्गुणातें म्हणां सगुण । राम बहुभूषण राहों द्या ॥१७॥ राम अविकारी निर्मळ । राम निरंजन निश्चळ । राम निर्धर्म निष्फळ । नलगे मळ तयासी ॥१८॥ राम परंज्योती अमळ । राम परंधाम सोज्ज्वळ । राम अद्वयानंद केवळ । न लगे मळ तयासी ॥१९॥ राम अरूप आद्य[3] अखिल । राम परमानंद बहळ । राम अनाम अगोत्र अचळ । नलगे मळ तयासी ॥२०॥ राम अद्वयानंद गहन । तोचि अंगें झाला जन । ऐसें म्हणतां अवघे जण । मज हें ज्ञान मानेना ॥२१॥ ऐसी ऐकोनि वदंती । गर्जोनि उठिला वेदांती । म्हणे एकडोळा जगतीं । डोळस त्याप्रति न म्हणावें ॥२२॥ निर्गुण म्हणसी श्रीरामातें । साधूनि नाना दृष्टांतांतें । त्या दृष्टांतांचे कारण येथें । न दिसे मातें जाण पां ॥२३॥ अणोरणीयान् आदिश्रुति । ऐक्य संपादूं वर्तती । तुझ्या दृष्टांतांची गणती । कोण निश्चितीं धरील ॥२४॥ म्हणसी कुलाल नव्हे घट । परी हे बोलचि वटवट । व्यर्थ युक्तीची खटपट । अंतर्निष्ठ न मानिती ॥२५॥ मृत्तिका विजाती कुलाला । म्हणोनि घट तियेचा केला । तैसा श्रीरामवेगळा । प्रपंच झाला काशाचा ॥२६॥ म्हणसी राम निर्विकार । तैं काय होत आकार । त्याचा केला विश्वाकार । हें साचार सांगावें ॥२७॥ आकाश पृथ्वी आप[4] जीवन । तेज आदि पांचै जाण । केलीं काशाचीं घडून । मजलागून सांगावें ॥२८॥ रामावेगळें काय होतें । मा त्याचीं केली पंचभूतें । ऐसें ज्ञान न कळे तूतें । काय दृष्टातें सांगसी ॥२९॥ तुझे पूर्वोक्त दृष्टांत । ते न होती समयोचित । रामस्वरूप इत्थंभूत[5] । तुज साद्यंत सांगतो ॥३०॥ बीजामाजी वृक्षाकार । सुवर्णीं जेंवी अलंकार । तेंवी श्रीरामीं संसार । मज साचार भासत ॥३१॥ जेंवी बीजचि झाला तरुवर । सुवर्ण झाला अलंकार । तेवी श्रीरामचि निर्विकार । स्वयें साकार जाहला ॥३२॥ राम म्हणावा निर्विकार । तंव तो भासतो साकार । साकार ना निराकार । परात्पर श्रीराम ॥३३॥ राम म्हणावा जरी निर्गुण । तरी तो प्रत्यक्ष भासे सगुण । एवं सगुण ना निर्गुण । आनंदघन श्रीराम ॥३४॥ ऐसी ऐकोनियां मात । वेद राहिले निवांत । अवघे वेदांतयासी नमित । धन्य म्हणत तत्वज्ञ ॥३५॥

हमुमंतकृत रामस्वरूपवर्णन : हें ऐकोनि हनुमंत । अवधियांसी नमस्कारित । म्हणे माझेंही

शब्दार्थ – १. स्तुतिपाठक, २. कुंभारानें, ३. सर्वांचा आदि, ४. उदक, ५. बरोबर.

हृद्‌गत । तुम्हीं समस्त परिसावें ॥३६॥ तुम्ही बोलिलां जो अर्थ । तो तंव शुद्धत्वें परमार्थ । श्रीरामाचें इत्थंभूत । स्वरूप निश्चित सांगितलें ॥३७॥ परंतु ऐका वेडें प्रेम । सुंदर सांवळा श्रीराम । हेंचि माझें अद्वय ब्रह्म । न कळे वर्म आणिक ॥३८॥ हातीं घेवोनि धनुष्यबाण । जेणें मर्दिला रावण । तें हें सांवळें ब्रह्म पूर्ण । पाहतां नयन निवती ॥३९॥ दासांसाठी अवतार धरित । वनरांचा तरी अंकित । तो हा माझा श्रीरघुनाथ । ब्रह्म निश्चित मज वाटे ॥४०॥ राम ज्ञानाचें निजज्ञान । राम ध्यानाचें निजध्यान । राम समाधी समाधान । चैतन्यघन श्रीराम ॥४१॥ राम भक्तांचें माहेर । राम ज्ञानाचें जिव्हार । राम साराचें निजसार । हा निर्धार पैं माझा ॥४२॥ रामांवाचूनि ब्रह्मज्ञान । आम्हांसी नलगे नलगे जाण । आमुचें ब्रह्म रघुनंदन । बोले गर्जोन हनुमंत ॥४३॥ राम सर्वदा मुखीं गाऊं । राम सर्वदा नित्य ध्याऊं । राम सर्वदा नेत्रीं पाहू । तरोनि जाऊं भवसिंधु ॥४४॥

राजाधिराज श्रीरामांचा सर्वांकडून एकमुखाने जयजयकार : ऐसिया हनुमंताचे वचनीं । गर्जो लागल्या संतश्रेणी । भला भला रे इहीं वचनी । झाली गगनीं पुष्पवृष्टि ॥४५॥ ऋषिवरांचा जयजयकार । वानरांचा भुभुःकार । मंगळवाद्यांचा गजर । नादें अंबर कोंदलें ॥४६॥ परमानंदें रघुनाथ । हनुमंतासी आलिंगित । स्वयें उचलोनि आनंदभरित । बैसवित निजासनीं ॥४७॥ राम वोळला[1] परमानंद । झाला त्रैलोक्यां आनंद । एका जनार्दनीं स्वानंद । नित्यानंद रामायणीं ॥४८॥

युद्धकांडात आलेली रामकथा : येथून संपलें युद्धकांड । पुढे ऐका उत्तरकांड । जनार्दनकृपा अखंड । कांडे कांड अर्थवी ॥४९॥ श्रीरामें जावोनि सुवेळेसी। दुर्गी देखोनि रावणासी । बाणें छेदोनि छत्रासी । युद्धकांडासी संपविलें ॥५०॥ शिष्ट धाडोनि अंगदासी । सभे गांजून दशमुखासी । प्रथम करोनि महारणासी । युद्धकांडासी संपविले ॥५१॥ प्रहस्तादि प्रधानासीं । अतिकायादि कुमारासीं । मारोनियां रणभिवेषीं । युद्धकांडासी संपविलें ॥५२॥ उठवोनि कुंभकर्णासी । रावण धाडी रणभूमीसीं । रामें निवटोनियां त्यासी । युद्धकांडासी संपविलें ॥५३॥ होम करितां निकुंभिळेसीं । तेथें धाडोनि लक्ष्मणासी । रणीं मारोनि इंद्रजितासी । युद्धकांडासी संपविलें ॥५४॥ द्विवार[2] आणोनि द्रोणाद्रीसी । उठविलें लक्ष्मणा वानरांसी । यश देवोनि हनुमंतासी । युद्धकांडासी संपविलें ॥५५॥ अहिमहि वीर प्रचंड । होते पाताळीं वितंड । त्यांतें करोनि खंडविखंड । युद्धकांड संपविलें ॥५६॥ होम करितां अति वितंड । वानर पाठवोनि प्रचंड । युद्धा आणोनि दशमुंड । युद्धकांड संपविलें ॥५७॥ रावण योद्धा अति प्रचंड । शिरें प्रसवला उदंड । रामें ठेंचोनि त्याचें तोंड । युद्धकांड संपविलें ॥५८॥ बाण सोडोनि प्रचंड । रावणाचें गर्वबंड । क्षणें करोनि खंडविखंड । युद्धकांड संपविलें ॥५९॥ रावणासी करोनि दंड । देव सोडविले उदंड । बिभीषण स्थापोनि अखंड । युद्धकांड संपविलें ॥६०॥ मुक्ति देवोनि रावणासी । भेटोनि दशरथासी । दिव्य घेवोनि सीतेसीं । युद्धकांडासी संपविलें ॥६१॥ विमानीं बैसोनि त्वरेंसीं । केलें रामेश्वरनमनासी । भेटोनियां अगस्तीसी । युद्धकांडासी संपविलें ॥६२॥ भेटोनि भरद्वाजासी । सर्वेचि भेटोनि गुहकासी । देवोनियां समाधानासी । युद्धकांडासी संपविलें ॥६३॥ चौदा वर्षे निराहारेंसीं । भरत राहिला

---

शब्दार्थ – १. कृपायुक्त झाला, २. दोन वेळा.

नंदिग्रामासीं । भेटोनियां स्वबंधूसी । युद्धकांडासी संपविलें ॥६४॥ रामें भेटोनि निजमातांसी । केलें व्रतविसर्जनासी । अंगीकरोनि निजराज्यासी । युद्धकांडासीं संपविलें ॥६५॥ यौवराज्य देवोनि भरतासी । सेनानीपण शत्रुघ्नासी । सुखी केलें कैकयीसी । युद्धकांडासी संपविलें ॥६६॥ सुखी केलें दासदासींसी । सुखी केलें निजप्रजेसी । आनंदवोनि निजवाक्येंसीं । युद्धकांडासी संपविलें ॥६७॥ संपलें युद्धकांड-निरूपण । पुढें उत्तरकांडकथा गहन । एका विनवी जनार्दन । श्रोते सज्ञान परिसोत ॥६८॥ माझी मिरासी मूर्खपण । नेणें पदबंधव्याख्यान । माथां हात ठेवोनि जनार्दन । वदवी रामायण निजसत्ता ॥६९॥ जनार्दनाची कृपा ऐशी । मूर्खाहातीं रामायणासीं । वदविलें रामकथेसी । कृपा ऐशी संतांची ॥७०॥ सद्गुरूची कृपा घडे । तैं पांगुळा पर्वत चढे । एकनाथें तेणें पाडें । केलें रोकडें मज सरतें[1] ॥७१॥ एका जनार्दना शरण । झालें युद्धकांडनिरूपण । श्रीरामकथा अति गहन । करी पावन महापापी ॥७२॥ कथा शतकोटिविस्तार । त्यांतील एकैक अक्षर । पडतां कानीं शुद्ध पापी नर । श्रीरामकथाक्षर पुण्यपावन ॥७३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे युद्धकांडे एकाकारटीकायां श्रीरामचरितकथनं नाम द्विनवतितमोऽध्यायः ॥९२॥ ओंव्या ॥७३॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

## युद्धकांडं समाप्तम्

---

शब्दार्थ - १. श्रेष्ठ

श्रीसद्गुरवे रामचंद्राय नमः



श्रीएकनाथमहाराजकृत

# श्रीभावार्थरामायण

## उत्तरकांड

### अध्याय पहिला

॥ ॐ नमः सच्चिदानंदाय ॥

#### हनुमंताला स्त्रीराज्याला पाठविणे

**सद्गुरुमहिमा :** ॐ नमो सद्गुरो जनार्दना । जनीं वनीं समान परिपूर्णा । सच्चिदानंदा चिद्घना । सेव्य सज्जनां सुरवर्या ॥१॥ तूतें गुरुत्वें वंदूं जाता । तंव जनीं वनीं देखें तद्रूपता । कार्यकारणकर्तृत्वता । तेही तत्वतां न देखें ॥२॥ ऐसें निजस्वरूप[1] अगाध । शंकले उपनिषदादि वेद । शेष श्रमला करिता वाद । शास्त्रानुवाद[2] खुंटला ॥३॥ परादि वाचा चारी । शिणोनि थोकल्या[3] दुरी । तेथें मंदमति नरीं । कवणे परी वर्णावें ॥४॥ तुझ्या स्वरूपा नाहीं अंत । अनंत म्हणतां मति भीत । द्वैतस्थानीं मुख्य अद्वैत । बोल बोलत सज्ञान ॥५॥ जैसें धर्म करितां जनीं । प्रतिष्ठेच्या पारडां बैसोनी । परलोक पावावा म्हणोनी । यागालागूनी प्रवर्तती ॥६॥ मुख बांधोनि मारितां पशु । अवदानीं संतृप्त हुताशु । त्यातेंही ठकवून अमरेशु[4] । नेत यागांशु[5] निजबळें ॥७॥ यालागीं जी परात्परा गुणातीता निर्विकारा । तुझ्या स्वरूपाच्या आकारा । न देखों विचारा शास्त्रमतें ॥८॥ तरूपासाव तरूची उपमा । काय कारण सांग आम्हां । हें वचन ऐकोनि म्हणे क्षमा । सज्जन हो तुम्हीं करावी ॥९॥

**संतसज्जनांचे महत्त्व :** तुम्ही सुखार्णवाचे पार । ब्रह्मया राष्ट्रा आधार । ब्रह्मा ब्रह्म हे तुम्ही सधर[6] ।

शब्दार्थ – १. आत्मस्वरूप, २. शास्त्रांचे तर्क, ३. स्तब्ध राहिला, ४. इन्द्र, ५. यज्ञभाग, ६. श्रेष्ठ.

ब्रह्म हा उद्गार पैं तुमचा ॥१०॥ अमृतपान करिता सुरवर । तृप्त होवोनि देती ढेंकर । तेंवी देतसें सुखोद्गार । स्वरूप अपार तुमचें ॥११॥ तुमचेनि कृपावलोकनें । सुखस्वानंदीं बैसे ठाणें । परब्रह्मींचें भरिजे केणें[1]। अक्षर[2] नाणें स्वरूप जें ॥१२॥ स्वरूपासी तरूची उपमा घडे । ऐसें वदावया सामर्थ्य थोकडें । परी तुमचे कृपाउजियेडें । शब्द बोबडे बोलतसें ॥१३॥ तरूच्या ठायीं मूळ शाखा त्वचा जळ । तो विस्तार मायेचा सकळ । उखरीं[3] भासे मृगजळ । तें सकळ सूर्यरश्मीचें ॥१४॥ जैसें वटबीज अणुप्रमाण । वृक्ष विस्तरला व्यापून गगन । तैसें ब्रह्म सूक्ष्म सान । ब्रह्म सनातन पैं असे ॥१५॥ धिटीव[4] करितां तुम्हांप्रती । मी तरी केवळ मंदमती । जनका बाळभाषणीं प्रीती । म्हणोनि विनंती करीतसें ॥१६॥

**श्रीगणेशवंदन, शारदा, सद्गुरु यांना वंदन :** शिवगणांमध्ये अग्रगण्य । जया नांव गजवदन । सद्गुरु विनायक नाहीं भिन्न । तथापि नमन तयासी ॥१७॥ मूषकवाहन एकदशन[5]। शैलजामानसचंदन । उदर उरगें कवळून । विघ्ना निर्विघ्न करीतसे ॥१८॥ आतां वंदूं शारदा जननी । जीतें बोलती हंसवाहिनी । वीणापुस्तकधारिणी । सज्जनांलागूनी कृपाळू ॥१९॥ जिचिये कृपादृष्टीं होये । मूकही वाचेतें लाहे । पांगूळ पर्वत लंघिताहे । यदर्थी संदेश असेचिना ॥२०॥ आतां वंदिजे सद्गुरू । जो कां मेघापेक्षां उदारू । ज्याचेनि स्मरणे संसारू । स्वप्नीं साचारू दिसेना ॥२१॥ तयातें वर्णावया वाणी । वेदें मूग आरोगूनी[6]। शास्त्रें नेति नेति म्हणोनि । म्लानवदनीं परतलीं ॥२२॥

**श्रीरामचरित्र ऐका :** आतां परिसा रामाचें चरित । वाल्मीक वदला अनागत । तेंचि देशभाषा प्राकृत । श्रोतीं चित्त पैं दीजे ॥२३॥ रजनीचर समस्त । प्रबळ झाले जी बहुत । त्यांच्या वधालागीं तेथ । विबुध[7] विनवित विष्णूसी ॥२४॥ ऐक गा ये लक्ष्मीकांता । राक्षस करिती उत्पाता । त्यांचिया वधाची चिंता । युक्ति आतां विचारिजे ॥२५॥ मग बोले रमारमण । मी रविकुळीं अवतरेन । तुम्हीं व्हावें वानरगण । राक्षसदळण करावया ॥२६॥ ऐसा करोनियां विचार । तंव आठवलें पूर्वउत्तर । होईन कौसल्याकुमर । ऐसा निर्धार पैं केला ॥२७॥ मग उपजूनि सूर्यवंशी । ख्याति केली अतिशयेंसीं । तें सांगेन संकळितेंसीं । सावकाशीं अवधारा ॥२८॥ गुरुयाग सिद्धी नेला । ताटका सुबाहु मारिला । मारीच बाणपिच्छें उडविला । ब्रह्मतनयेचा केला उद्धार ॥२९॥ शिवचाप भंगिलें । जनकाचें मन निःसंदेह केलें । जानकीतें पर्णिलें । मानविलें भार्गवातें ॥३०॥ पुढें वनवास सेविला । त्रिशिरा खर दूषण मारिला । शूर्पणखे अपमान केला । मावेचा वधिला मृग तेथें ॥३१॥ जगज्जननी जनकनंदिनी । ते चोरिली राक्षसें येवोनी । तिचे शुद्धीलागीं[8] बंधु दोनी । वनोपवना लंघिते झाले ॥३२॥ पुढें वायुपुत्र भेटला । तेणें सुग्रीव मित्र केला । मग बाणें एकें वाळी वधिला । राज्यीं स्थापिला सुग्रीव ॥३३॥ मग सीताशुद्धीलागीं वानर । पाठविला वायुकुमर । तेणें लंका जाळून सत्वर । राक्षसमार पैं केला ॥३४॥ अरिबंधु[9] शरण आला । तयाचा अंगीकार केला । शिळीं सेतु बांधिला । मग पावला सुवेळागिरि ॥३५॥ शिष्टाई पाठविला वानर । लंकेश न मानीच उत्तर । मग कोपारूढ रघुवीर । काय विचार करिता झाला ॥३६॥ समस्त प्रधान मारले । इंद्रजितादि सुत संहारिले । कुंभकर्णासी नवटिलें । रावणा वधिलें कुळासहित ॥३७॥ राज्य दिधिलें अरिबंधूसी । आपण निघाले अयोध्येसी । जानकीलक्ष्मणवानरेंसीं । पितृपुरीसी पावले

---

शब्दार्थ - १. माल, जिन्नस, २. अविनाशी, ३. माळजमिनीवर, ४. अभिमान, ५. एकदंत, ६. गिळून (मूग गिळून=मौन स्वीकारून), ७. देव, ८. शोधासाठी, ९. बिभीषण.

॥३८॥ भेटले बंधु भरतासी । सुखी केलें समस्तासीं । अयोध्याजन मानसीं । थोर उल्लास पावले ॥३९॥ समस्तांचे मनीं होतें । वसिष्ठाचेनि अनुमतें । राज्य अंगीकारिलें रघुनाथें । धर्मस्थापनेतें करावया ॥४०॥ मग वानरां समस्तां आज्ञा झाली । बिभीषण सुग्रीवा बहुडावणी[1] दिधली । मग हनुमंताप्रति मंजुळीं । बोले मैथिलीकांत तो ॥४१॥

श्रीरामकृत हनुमंतप्रशंसा : वायुपुत्रा तुझा उपकारू । मज श्रीरामा झाला थोरू । तो न फिटे साचारू । नानावतारू धरितांही ॥४२॥ तुझा आठवितां महिमा । मज श्रम होतसे श्रीरामा । तेथें इतरांची कायसी सीमा । अगा उत्तमा वायुपुत्रा ॥४३॥ वायुपुत्रा तुझी थोरी । उपमे वीर नाहीं धरित्री । विरंचिअंडामाझारीं[2] । तुळणे सरी न पवे ॥४४॥ ऐसा तूं गा अगाध । तुज मज नाहीं भेद । याही बोलाचा विषाद । वाटे सुबुद्ध माझे मनी ॥४५॥ तूं साक्षात् रुद्राचा अवतार । ब्रह्मादिकां न कळे पार । परी कांही तुज कार्यप्रकार । असे साचार सांगणें ॥४६॥ तंव हनुमंत म्हणे श्रीरामा । तुज सांगणे उरलें आम्हां । परी एक अपेक्षा पुरुषोत्तमा । असे ते महिमा सांगेन ॥४७॥

हनुमंताची इच्छा : रघुनाथकथा श्रवणीं । रघुनाथनाम वदनीं । रघुनाथमूर्ति ध्यानीं । चित्त रघुनंदनीं असावें ॥४८॥ रघुनंदनीं असावें मन । रघुनंदनीं इंद्रियप्राण । रघुनाथ आत्मा होऊन । परिपूर्ण जाण असावें ॥४९॥ जेथें होईल श्रीरामकीर्तन । तेथें व्हावें माझें आगमन । हेंचि मागणें जाण । कृपा करून मज द्यावें ॥५०॥ ऐसा अंजनीगर्भरत्नें । राम प्रार्थिला मंजुळ-वचनें । पुढती म्हणे हेंचि देणें । कृपा करणें कृपाळुवा ॥५१॥ मग हांसोनि बोलिजे सीतारमणें। हें काय घेतलें तुझेनि मनें । आतां निजस्थाना जाणें । केलें पावणें अवश्य ॥५२॥

रामाज्ञेप्रमाणे मारुती आपल्या मूळ स्थानास निघताच श्रीरामांनी त्याला निराळेच काम सांगितले : मग हनुमंते ते अवसरीं । प्रदक्षिणा करोनि जोडल्या करीं । मस्तक ठेवूनि चरणांवरी । अति सत्वरीं निघाला ॥५३॥ परतोनि पाहे कपिवीर । तंव श्रीराम बोले उत्तर । एक आठवलें कार्य थोर । तें सादर अवधारीं ॥५४॥

रावणाची पूर्वकथा : पूर्वी तया दशाननें । तप केले राज्याकारणें । मग शंकर प्रसन्नपणें । बोले वचन तयाप्रति ॥५५॥ माग माग रे ये समयीं । जे इच्छा असेल ते देईन पाहीं । ऐसे ऐकोनि ते समयीं । बोले लवलाहीं रावण ॥५६॥ प्रसन्न झालासी विश्वनाथा । तरी अक्षयी राज्य द्यावें तत्वतां । पुत्र बंधु सुहृद पूर्णता । इतुकें आतां मज देईं ॥५७॥ मरण न यावें विबुधांहातीं[4]। आज्ञा वंदावी समस्तीं । सुवर्णाचें नगर वस्ती । द्यावें कृपामूर्ति कृपाळुवा ॥५८॥ ऐसें ऐकोनि राक्षसवचन । संतोषला उमारमण । हें तुज दिधलें संपूर्ण । परी मरण चुकेना ॥५९॥ शिरःकमळीं पूजिला चंद्रमौळी । म्हणोनि पावला दहा सिसाळीं[5] । आश्चर्य नरीं भूमंडळीं । दुसरा बळी असेना ॥६०॥ सुरासि[6] पुसे जगन्नाथा । माझा कोण प्राणहंता । तो सांगावा जी आतां । संदेह तत्वतां न धरावा ॥६१॥

रावण प्रारब्धमहिमा वर्णितो : शरीरे असे प्रारब्धाधीन । सुखदुःख भोगी प्रारब्धेंकरून । ब्रह्मादिकां न सुटे जाण । प्रारब्ध पूर्ण बळवंत ॥६२॥ प्रारब्धें इंद्र भगांकित । प्रारब्धें अहल्ये जडत्व प्राप्त । प्रारब्धें शुक नग्नभूत । पृथ्वी हिंडत स्वइच्छा ॥६३॥ प्रारब्धें हरिश्चंद्रे सूर्यवंशी । दान दिधलें विश्वामित्रासी । तारामतीसहित आपणासी । तेणें डोंबासी विकिलें ॥६४॥ प्रारब्धें दमयंती नळा । तेणें भोगिली अवकळा[7] । प्रारब्धें बळी भूपाळा । नेलें पाताळा वामनें

---

शब्दार्थ – १. निरोप, परवानगी, २. ब्रह्मांडामध्ये, ३. अंजनीपुत्राने (मारुतीने) ४. देवांच्या हाताने, ५. शिरे, ६. रावण, ७. दुःखावस्था.

॥६५॥ प्रारब्धें श्रीवामनासी । खुजटपण परियेसीं । प्रारब्धें नीचत्व त्यासी । याची[1] भूमीसी तीन पाउलें ॥६६॥ प्रारब्धाचा थोर आघात । सृष्टिकर्त्या न सोडित । सरस्वतीसी देखोनि भ्रांत । प्राकृत तेथ कवणीकडे ॥६७॥ यालागीं शैलजानाथा । प्रारब्ध बळवंत समस्तां । त्या प्रारब्धाची महिमा वर्णितां । शेषाही सर्वथा न वर्णवे ॥६८॥ न कळे विष्णूचे अवतार । न कळे समुद्राचा पार । न कळे आकाशाचा विस्तार । न कळे ईश्वर महिमा ॥६९॥ न कळे शंभूचें तप । न कळे विष्णूचा प्रताप । न कळती योगीश्वर अमूप । कोण कोठें विचरती ॥७०॥ न कळे ध्रुवाची थोरी । न कळे पंडिताची चातुरी । न कळे हा काम वैरी । कोण अवसरीं उकील[2] ॥७१॥ न कळे अहीचें थोरपण । न कळे मीनाचें चळण । न कळे विहंगमउड्डाण[3] । स्थूल सान नेणवे ॥७२॥ न कळे स्त्रियेचें चित्त । न कळे कर्म बळवंत । न कळे ब्रह्मरेखालिखित। होत जात ललाटीचें ॥७३॥ न कळे श्रीरामाचा महिमा । न कळे हे हनुमंतप्रतापसीमा । न कळे नारद कोण्या कर्मा । घेवोनि वीणा हिंडतसे ॥७४॥ न कळे श्रीगुरु आनंदसागर। न कळे मेघ कृपण कीं उदार। न कळे शेषें भूमिभार । काय निमित्त घेतला ॥७५॥

शंकरांना रावण आपले मरण विचारतो : यालागीं दयासागरा । मरण सांगा जी उदारा । तरीच मानेल वर निर्धारा । करुणाकरा कृपानिधे ॥७६॥ मग हांसोनियां बोले शूळपाणी[1] । रावणा ऐक सत्यवचनीं । मरण पुससी मजलागूनी । तरी ऐक श्रवणीं लंकेशा ॥७७॥ वाराणसीच्या उत्तरपारीं । अयोध्या नामें महानगरी । येथें अजाचिये उदरीं । होईल क्षत्री दशरथ ॥७८॥ त्यासी तिघी जाया[4] प्रसिद्धा । ज्येष्ठ कौसल्या सद्विद्या । दुसरी सुमित्रा साधुवंद्या । कैकेयी अविद्या तिसरी ॥७९॥

दशरथकुलोत्पन्न श्रीरामांच्या हातून तुझे मरण आहे असे शंकर सांगतात : ते कौसल्याउदरीं श्रीराम । अवतरले पूर्णब्रह्म । सुमित्रेउदरीं शेष परम । पुरुषोत्तम जन्मले ॥८०॥ कैकेयीउदरीं भरत शत्रुघ्न । दोघे पुत्र सुलक्षण । चवघे कीर्तिवंत गहन । पुण्यपावन त्यांची कथा ॥८१॥ त्या रामहस्तें तुझा घात । होईल जाण निश्चित । हें ऐकोनि तटस्थ । चिंताक्रांत रावण ॥८२॥ ऐसा तो राक्षस संहारिला । सहपरिवारें निर्दळिला । सिद्धी झाली देवकार्याला । आनंदें भरिला सागर ॥८३॥

त्या स्त्रीराज्यात त्यांच्या संरक्षणासाठी जाण्याची मारुतीला रामांची आज्ञा: तरी तुम्हीं आतां ऐकिजे । स्त्रीराज्यांत आपण जाइजे। तयाचें संगोपन[5] कीजे । सावचित्ते बरवियापरी ॥८४॥ तेथें संचार न होऊं द्यावा पुरुषाचा। राज्यधर्म रक्षावा तयांचा। षणमासांच्या अति भुभुःकाराच्या॥ गजरें पुरुषाचा गर्भपात ॥८५॥ ऐसें तेथें रक्षण असावें। कार्य पडलिया येथें यावें । येणें उत्तरें राघवें । हनुमान गौरवें आज्ञापिला ॥८६॥ यालागीं गा वायुसुता । कार्य असावें सादरता । षणमासांअंतीं तत्वतां । भुभुःकारता तेथें द्यावी ॥८७॥ तया भुभुःकारेंकरून । सिद्धकार्य होईल जाण । ऐसा श्रीरामें वर देऊन । हनुमानालागून बहुडाविलें[6] ॥८८॥

हनुमंतांचे गमन : ऐसी आज्ञा केली सीतारमणें । ते शिरीं वंदिली वायुनंदनें । पुढे कथा वर्तली ते वचनें । सावधानें परिसावी ॥८९॥ अनागतभाष्य रामायण । वदला वाल्मीक आपण । संख्या शतकोटिप्रमाण । तें कथानुसंधान अवधारा ॥९०॥ वाल्मीक थोर उपकारी झाला । आपण तरोनि जन तारिला । रामनामाचा सुकाळ[7] केला । जन लाविला मोक्षपंथें ॥९१॥ आपण तरोनि इतर तारी । तोचि धन्य संसारीं । तया वंदिजे सुरवरीं । स्वयें श्रीहरि

शब्दार्थ - १. याचना करतो, २. फसवील, ३. पक्ष्याचें उडणें, ४. स्त्रिया, ५. संरक्षण, ६. पाठविलें, ७. सवंगाई, स्वस्ताई. (१) अज्ञान, मोह

संनिध ।।९२।। एका जनार्दनाचे रंकाचें रंक । त्या बाळकाचे वाचे अच्युत देख । म्हणोनि गुरुमहिमा अधिक । तेणें निर्दोख पैं वाणी ।।९३।। स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां हनुमंतस्त्रीराज्यप्रेरणं नाम प्रथमोऽध्याय: ।।१।। ओंव्या ।।९३।।

## अध्याय दुसरा

।। श्रीसच्चिदानंदाय नम: ।।

### पुलस्त्यांचे आख्यान

भद्रासनीं दशरथकुमर । बैसलासे करुणाकर । दक्षिणे शेषावतार[1] । वामे भरतशत्रुघ्न ।।१।। कुळगुरु वसिष्ठ सन्मुख । परिवेष्टित प्रधान लोक । चर्चा करिती धर्मकर्मादिक । तर्कवितर्क बोलती ।।२।। एक सांगती पुराण । एक करिता रामकीर्तन । एक करिती गायन । होऊन लीन स्वात्मपदीं ।।३।। एक पढती चतुर्वेद । एक म्हणती प्रबंध । एक करिती विवाद । गद्यपद्य शास्त्रांचे ।।४।। ऐसी सभा प्रसन्नवदन । देखोनि वंदिती बंदिजन[2] । एक म्हणती हा रघुनंदन । ब्रह्मीं जीवन मूर्तिमंत ।।५।। एक म्हणती हा रघुनंदन । अवतार धरावया एक कारण । एक म्हणती धरा भारें पीडोन । श्रीरामा शरण गेली ते ।।६।। तिचिया कैवारा राघव । सगुण होवोनि सावयव । मारोनयां दशग्रीव[3] । बंदींचे देव सोडविले ।।७।। श्रीराम भक्तजनवत्सल । नानावतारीं खेळे खेळ । ब्रह्मादिकां महिमा अकळ[4] । मूर्ख केवीं नेणती ।।८।। ऐसे नानापरींचे वाद । करिती परस्परें विवाद । नानामतप्रबंध । छंद भेद शास्त्राचें ।।९।। युद्धकांड येतां अंतीं । राक्षसांची झाली समाप्ती । अवनिजेसीं[5] रघुपती । अयोध्यें क्रीडती स्वानंदें ।।१०।। राज्य करितां श्रीरामचंद्र । कोणा नाहीं दु:ख दरिद्र । स्वप्नीं नाहीं द्वंद्वबाध । सुखस्वानंद सर्वांसी ।।११।। रजनीचर[6] निर्दाळिले । त्रैलोक्या आनंदें भरिलें । हें ऐकोनि ऋषि चालिले । भेटी आले श्रीरामा ।।१२।।

**अनसूया व अत्री यांचा महिमा :** अत्रि आला निजशिष्येंसीं । जेणें दुष्काळीं वांचविले ऋषी । जयाची राणी अनसूया ऐसी । पतिव्रतांसी वंद्यत्वें ।।१३।। जे अनसूयेच्या घरीं । ब्रह्मा विष्णु त्रिपुरारी । बाळपणें एक संवत्सरीं । स्तनपान करिती त्रिमूर्ति ।।१४।। ज्या अगस्तीनें समुद्र शोषिला । वातापी इल्वल उदरीं पचिला । विंध्याचळाचा गर्व हरिला । तो कुंभज[7] आला भेटीसी ।।१५।। तप करोनि भूमंडळीं । प्रसन्न केला चंद्रमौळीं । गंगा मागोनि महीतळीं । ऋषिमंडळी निवविली ।।१६।। उभयतट गोदावरी । पंचक्रोशीभीतरीं । जड जीव तरती तीं परिवारीं । शिष्यांमाझारी गौतम आला ।।१७।। कण्व भारद्वाज च्यवन । अंगिराजगुरु कौंडिन्य । घ्यावया श्रीरामदर्शन । कश्यप आपण स्वयें आला ।।१८।। जेणें सृष्टि निर्माण केली । ख्याति त्रिभुवनीं मिरवली । ज्यांसी झाली गोत्रभुली । ते लाविले स्वगोत्रीं ।।१९।। दत्तात्रेय महाऋषी । असित जमदग्नि परियेसी । विश्वामित्र शिष्येंसीं । आणिक तापसी पैं आले ।।२०।। गायत्रीमंत्रबळें जाण । दुजी सृष्टि केली निर्माण । ऐसे ऋषि तपोधन । देदीप्यमान तेजस्वी ।।२१।।

**श्रीरामांनी ऋषींचा सत्कार करून त्यांना भोजनदानादि दिले :** श्रीराम येवोनि सामोरा । सन्मान केला द्विजवरां । अर्घ्य पाद्य षोडशोपचारां । करूनि हाकारा भोजनें केलीं ।।२२।। समस्तां

शब्दार्थ – १. लक्ष्मण, २. भाट, ३. रावण (दहा मस्तकांचा), ४. अगम्य, ५. सीतेसह, ६. राक्षस, ७. अगस्ती.

झालें भोजन । कर्पूरमिश्रित पूगीपानें । नानापरींचीं वस्त्रें भूषणें । रघुनंदने दिधलीं ॥२३॥ श्रीरामें साष्टांग नमन घालून । दोनी कर जोडून । मृदु मंजुळ वचनेंकरून । करी प्रार्थन ऋषींचें ॥२४॥ श्रीराम म्हणे ऋषि तुम्ही । न भेटां करितां तप आश्रमीं । भाग्यें माझिये आश्रमीं । अनकळत तुम्ही आलेती ॥२५॥ कीं आजि दोषांचा ऱ्हास झाला । भाग्योदय पूर्ण बिंबला । कीं अकस्मात मेघ वोळला[1] । वर्षाव झाला स्वानंदें ॥२६॥ ऐसें आजि झाले स्वामी । कृपा करोनि आलेति तुम्हीं । जे न भेटाल कृतश्रमीं । पावन मी आजि झालों ॥२७॥ कवणा कार्याची उत्कंठा असे । ते सिद्धी जाईल अनायासें । मी तुमचा अंकित शिष्यवेशें । आज्ञा संतोषें करावी ॥२८॥

अगस्तिकृत श्रीराममहिमावर्णन : तंव अगस्ति म्हणे श्रीरामा । न वर्णवे तुझा महिमा । सृष्टिकरिता जो ब्रह्मा । त्यासिही महिमा न कळे तुझा ॥२९॥ तूं परात्पर निर्गुण परम । तूं साक्षात् पूर्ण ब्रह्म । तुज नाहीं रूप नाम । वेदां अगम्य स्वरूप तुझें ॥३०॥ तुज वर्णिता वेदश्रुती । थोंटावल्या[2] मागें किती । साही दर्शनें[3] वेदश्रुती । इतरांची युक्ती तेथें न चले ॥३१॥ ऐसा तू निर्गुण निरुपम । तुज ठेविती रूप नाम । तुझ्या अंगीं लाविती कर्म । तें ज्ञानाधम म्हणावे ॥३२॥ न कळे त्याचा मनोरथ । न कळे चतुराचें चित्त । न कळे कवितार्थ । रवि न देखे ते कवि देखे ॥३३॥ तूं अजन्मा जन्म धरिसी । तू अकर्मा कर्म करिसी । तूं अकर्ता सृष्टीसी । उत्पत्ति स्थिति संहार ॥३४॥ तुझाचि आधार तया । यालागीं ज्ञानें म्हणती वायां । ऐसें असोनि श्रीरघुराया । थोर आश्चर्या ऐकिलें ॥३५॥ सापत्नमातेच्या वचनीं । सांडिली अयोध्या राजधानी । वास केला दंडकारण्यी । राक्षस रणीं निर्दळिले ॥३६॥ शूर्पणखा विटंबून । मारिले त्रिशरा खर दूषण । इंद्रजित रावण कुंभकर्ण । सप्रधान मारिले ॥३७॥ अरिबंधु बिभीषण । त्यासी दिधलें लंकाभुवन । बंदी ग्रह सुरगण । त्याचें मोचन तुवां केलें ॥३८॥ भार्याबंधूंसहित । अयोध्ये आला रघुनाथ । रामराज्य त्रिभुवनात । ऐसें श्रुत आम्हां झालें ॥३९॥ म्हणोनि घ्यावया तुझी भेटी । येथें आलों गा जगजेठी । हेचि इच्छा ऋषीचे पोटीं । श्रीराम दृष्टीं पहावा ॥४०॥ अपूर्व एक रघुनाथा । लक्ष्मणें वधिलें इंद्रजिता । हें आश्चर्य वाटे चित्ता । या समस्तां ऋषीश्वरां ॥४१॥ राम म्हणे अगस्तिमुनी । रावण कुंभकर्ण दोनी । म्यां मारिले समरांगणीं । द्रुमपाणी प्रहस्तादि ॥४२॥ कुमार अक्ष जंबुमाळी । विरूपाक्ष अकंपन बळी । कुंभ निकुंभ वीरमंडळी । राक्षस समूळीं मारिले ॥४३॥ आणिक असंख्य राक्षस । नावानिगे[4] रणकर्कश । जे तृणवत मानिती काळास । तेही त्रास पावले ॥४४॥ इतुके निशाचर सबळ । त्यांहूनि शक्रजिताचें[5] बळ । तुम्ही वानितसां प्रबळ । मज केवळ कळेना ॥४५॥

श्रीरामांनी इंद्रजिताच्या थोरवीचे कारण ऋषींना विचारले : शक्रजिताची महाथोरी । तुम्ही वानितसां भारी । मज वाटे नवलपरी । तें निर्धारीं सांगावें ॥४६॥ इंद्रजिताचा पराक्रम पूर्ण । त्यासी वर देता कोण । हे सांगावें कृपा करून । मजलागून ते कथा ॥४७॥ कुंभोद्भव[6] म्हणे श्रीरामा । ऐक त्याचा प्रतापमहिमा । तूं सकळांचा आत्मा । कां पुरुषोत्तमा नेणसी ॥४८॥ रावणाची उत्पत्तिस्थिति । तुज सांगेन अवनिजापती[7] । वर देता तयाप्रती । तो यथानिगुतीं अवधारीं ॥४९॥

पुलस्त्याची पूर्वकथा : पूर्वी कृतयुगामाजी जाण । प्रजापतिसुत पुलस्त्य पावन । पुण्यशीळ अगाधगुण । धर्मपरायण तिहीं लोकीं ॥५०॥ वेदसंपन्न शास्त्रीं निपुण । सर्वभूतीं भगवद्भजन ।

---

शब्दार्थ - १. वर्षला, २. स्तब्ध झाल्या, ३. योग, सांख्य, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदांत, ४. नामंकित, ५. इंद्रजिताचे, ६. अगस्तिऋषी, ७. सीतापती. (४) कुंभकर्ण पुत्र

शांति दया सुशीळपण । तयें दारुण तपस्वी ॥५१॥ पितयाचे धर्मेकरूनि । अपेक्षा नाहीं तिळभरी । तंव कोणें एके अवसरीं । मेरुपाठारीं प्रवेशला ॥५२॥ तेथें तृणबिंदूचा आश्रम । अति रमणीय परम । भोंवतीं उद्यानें गहन । सरोवरीं जीवन अक्षोभ्य ॥५३॥ नाना जातीचें वृक्ष सफळ । नानापुष्पीं सुवासित बहळ । मधुर शब्दें हंस कोकिळ । रुंजी अलिकुळ[1] करिताती ॥५४॥ तेथें ऋषि तप करी । भस्म चर्चून शरीरीं । रुद्राक्षमाळा कंठीं शिरीं । श्रीराम अंतरीं जप करी ॥५५॥ नेमस्त आहार इंद्रियें निग्रहूनी । वेदाध्ययन अनुदिनीं । तंव कोणें एके समयीं त्या वनीं । आल्या मिळोनि राजकन्या ॥५६॥ देखोनि ऋषिआश्रमासी । कन्या क्रीडती आनंदेसीं । भोंवत्या पाहती तंव ऋषी । तेजोराशी देखिला ॥५७॥ पुलस्त्य म्हणे राजकुमारी । येथोनि तुम्हीं जावें झडकरी । माझी वेदध्वनि पडतां कर्णद्वारीं । तुम्ही गरोदरी व्हाल सर्व ॥५८॥ ऐसें ऐकोनि राजबाळा । शीघ्र गेलिया त्या वेळा । तंव कोणे एके काळीं स्वलीळा । तृणबिंदुबाळा पाहूं आली ॥५९॥

पुलस्तीचा वेदध्वनी कानी पडल्यामुळे तृणबिंदूची कन्या गर्भवती झाली : सखिया न दिसती नयनीं । ऋषीची वेदध्वनि पडली कानीं । तेणें झाली श्वेतवर्णी । वपु[2] तत्क्षणीं पालटली ॥६०॥ उदरीं गर्भ संभवला तियेसीं । मग आली जनकभुवनासी । तृणबिंदु म्हणे कुमारीसी । शुभ्रता वपूसी कां आली ॥६१॥ चिन्ह तुझें पालटलें । आत्मजे कोठें काय झालें । कोण्या स्थळा गमन केलें । ते शीघ्रकाळें सांग पां ॥६२॥ येरी म्हणे अहो जी ताता । मज सखिया शोधन करितां । वना गेलें जी शीघ्रता । तेथें ऋषि पढत होता वेदश्रुती ॥६३॥ मग कन्या धरोनि निजकरीं । तृणबिंदु आला त्या आश्रमामाझारीं । कर जोडूनि विनंती करी । म्हणे अवधारीं मुनिराया ॥६४॥ माझी कन्या या आश्रमाप्रती । आली सखया शोधनार्थी । तिसी ऐसी झाली स्थिती । काय गती हे न कळे ॥६५॥ येरू म्हणे अगा हे ऋषी । हे आली गेली श्रुत नाहीं आम्हांसी । कवण जाणे या अर्थासी । हें आपणासी नेणवे ॥६६॥ मग तो ऋषि विचारी ज्ञानीं । म्हणे पूर्वी शाप वदला होता मुनी । कन्यामात्र[3] माझ्या वेदध्वनी । ते गुर्विणी होईल ॥६७॥

ती कन्या पुलस्तीला देण्याचा बापाचा मानस : तंव तृणबिंदु विचारी चित्तीं । हे अर्पावी ऋषीप्रती । ऐसी विचारोनि युक्ती । ऋषीप्रती वदता झाला ॥६८॥ अहो जी पुलस्ती महामुनी । विनंती करितों सलगी करोनी । हे कन्या अंगीकारावी सेवेलागूनी । दास्य अनुदिनीं करील ॥६९॥ पुलस्ती म्हणे ऋषिवर्या । आम्हां तापसां कोण कार्या । काय सेवा आचरावया । इसी कायसा देतोसी ॥७०॥ तृणबिंदु म्हणे अकल्पित आलें । त्यासी अंगीकारिती साधु भले । कल्पिलें सहसा न फळे । इतें भावबळें अंगीकारिजे ॥७१॥

पुलस्तीचा होकार : पुलस्ती म्हणे बरवें आतां । नुल्लंघीं तुझिया वचनार्था । येरें चरणीं ठेविला माथा । कन्या तत्वतां देता झाला ॥७२॥ शुभ दिन पाहूनि लग्न । तृणबिंदूनें केलें कन्यादान । पुढें दोघें सुखसंपन्न । स्वाश्रमीं जाण विचरती ॥७३॥

पतिसेवेने त्या कन्येवर प्रसन्न होऊन ऋषींचा पुत्रप्राप्तीचा वर तिला मिळाला : भ्रताराची सेवा करी । त्यासी मानी आत्मसाक्षात्कारी । भ्रतार सांडून तिळभरी । दुरी सुंदरीते न वचे ॥७४॥ तिची देखोनि उत्कृष्ट सेवा । संतोष झाला ऋषीच्या जीवा । म्हणे तुज पुत्र होईल बरवा । सर्वभावा अनुकूल ॥७५॥ मजसमान होतील गुण । मजसमान तपोधन । मजसमान

---

शब्दार्थ - १. भ्रमरसमुदाय, २. शरीर, ३. कोणतीही कन्या, प्रत्येक कन्या.

देदीप्यमान । तप अनुष्ठान करील ॥७६॥ पुलस्तीपासून जो निर्माण । तया नांव पौलस्ती जाण । ऐसें ऐकोनि प्रीतिवचन । आनंदें मन निवालें ॥७७॥ त्याउपरी त्या अबळेसी । प्रसूति झाली सकाळेंसीं । पुत्रमुख पाहे ऋषी । विधिकर्मांसी पैं केलें ॥७८॥ पूर्ण जातक वर्तविले । पौलस्ती नांव ठेविलें । वेद श्रवणीं पडिलें । विश्रवा झाले दुजें नाम ॥७९॥ यालागीं पुलस्तीचा पौलस्ती । विश्रवा त्यासी म्हणती । वाल्मीकि रामायणाप्रती । कथा संतीं पहावी ॥८०॥ मूळीं वाल्मीकि कवि कर्ता । तयाचा आधार कवित्वा समस्तां । यालागीं रामकथा वदतां । संदेह सर्वथा न धरावा ॥८१॥ वाल्मीकीचें वाग्रत्न[1] । ते हे कथा रामायण । सज्जनांचें अंत:करण । भावी[2] पूर्ण भावार्थ ॥८२॥ एका जनार्दना शरण । म्हणतां गेलें एकपण । अच्युत[3] चित्तीं जनार्दन । तो जन वन व्यापूनि असे ॥८३॥ अच्युत नाम जयाचे वाक्पुटीं । तयासीं विषयासी पडे तुटी । संसाराचें धरणें उठी । परब्रह्मभेटी पैं होय ॥८४॥ अच्युत नाम जयाचे वाचे । तया भय नाहीं संसाराचें । यश लाहे[4] तोचि साचे। कळिकाळ त्याचे तोडरीं ॥८५॥ एका जनार्दनीं भेटी । द्वंद्वदु:खा पडली तुटी । संसाराचें धरणें उठी । स्वानंदपुष्टी पूर्णत्वें ॥८६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां पुलस्त्याख्यानं पौलस्त्यजन्मकथनं नाम द्वितीयोऽध्याय: ॥२॥ ओंव्या ॥८६॥

## अध्याय तिसरा

॥ श्रीसच्चिदानंदाय नम: ॥

### विश्रव्याची कथा

**विश्रव्याची तप:साधना :** मग तो पुलस्त्यनंदन । विराम परम पावन । तेजें जैसा सहस्रकिरण। धर्मपरायण पवित्र ॥१॥ कर्माचरणीं अति प्रसन्न। चहूं वेदांचे अध्ययन । शास्त्रांविषयीं महाप्रवीण । भगवद्भजन अहर्निशीं ॥२॥ शांति दया सुशीळव्रत । गुरुसेवेसी रतचित्त । परोपकारीं वेंची जीवीत । पितृभक्त अतिशयें ॥३॥ सर्वभूतीं समता देखे । साधुजनां आत्मत्वें ओळखे । पराचा गुण दोष न देखे । ऐसा सुखें तो असे ॥४॥ अष्टांगयोग साधूनी । प्राणापान जिणोनीं[5] । मुद्रा खेचरी अगोचरी तिन्ही । लंघूनी ब्रह्मस्थानीं पावला ॥५॥ ऐसा योगनिष्ठ तपोनिष्ठ धर्मनिष्ठ ऋषी। आचरे आश्रमविहित कर्मांसी । नुलंघी मातृपितृवचनासी । द्वेष तयासीं असेना ॥६॥

**त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन भरद्वाजाने आपली कन्या त्याला दिली :** जाणोनि तयाचें तप श्रेष्ठ। भरद्वाज आला तपोनिष्ठ । बोलता झाला येवोनि निकट । म्हणे अति संतुष्ट मी झालों ॥७॥ माझें देववर्णनीय कन्यारत्न । तें मी तुज देतों दान । बरवा पाहूनि सुदिन । कन्यादान तेणें केलें ॥८॥ गृहाश्रमीं स्वधर्मी रक्षण । स्त्रियेवांचून नव्हे जाण । अग्निहोत्र यज्ञाचरण । स्त्रियेवांचून चालेना ॥९॥ अतीतभोजन पंचमहायज्ञ । देवतार्चन पितृतर्पण। कामरक्षण पुत्रसंतान । स्त्रियेवांचून तें नव्हे ॥१०॥ पतिवचनीं निजरत । तेचि पतिव्रता निश्चित । पतिवचनीं जे उदासभूत । ते जाण निश्चित समवेश्यां[6] ॥११॥ ज्या स्त्रिया पति वंचिती । ज्या पतीतें

---

**शब्दार्थ -** १. वाणी, २. मानी. ३. अखंड, ४. मिळवितो, ५. जिंकून, ६. वेश्येसमान.

निखंदिती[1]। ज्या पतीतें द्वेषिती । त्या निश्चितीं समवेश्या ॥१२॥ असो तो विश्रवा ऋषी । संतोषला स्त्रीगुणांसी । वदता झाला तियेसी । अतिप्रेमेंसीं सत्वर ॥१३॥ म्हणे अवो प्रिये कांते । तुज पुत्र देईन निश्चितें । जयाची कीर्ति त्रिभुवनातें । विस्तारातें पाववी ॥१४॥ मग ते भरद्वाजनंदिनी । भ्रतार वचनें संतोषोनी । सर्वेचि ऋतुस्नात होउनी । गर्भे गर्भिणी ते झाली ॥१५॥

पुत्रप्राप्ती : यथाकाळें झाली प्रसूती । महातेजें झाली तेजोदीप्ती । ऋषि येवोनि पुत्रमुखाप्रती। आनंदस्थितीं न्याहाळित ॥१६॥ कर्म करोनि विधिपूर्वकेंसीं । नाम ठेविलें वैश्रवण त्यासी । दिवसें मासें अति त्वरेसीं । पुत्र वृद्धीसी पावला ॥१७॥ विश्रव्यापासून वैश्रवण । तयासीच म्हणती कुबेर जाण । झाला पितयासमान । देदीप्यमान तेजस्वी ॥१८॥ शांत दांत उदार पूर्ण । शीळसंपन्न उत्तम गुण । चतुरानन सहितगण । स्वानंदे पूर्ण तेथें आला ॥१९॥

त्या तेजस्वी वैश्रवणाच्या उग्र तपश्चर्येने प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने त्याला लोकपाळ कुबेर केले : अवलोकोनि बाळकासी । स्रष्टा आनंदें मानसीं । धनद कुबेर नाम त्यासी । स्वइच्छेसीं ठेविलें ॥२०॥ हुताशन आहुतिबळें वाढे । वैश्रवण तेणेंचि[2] पाडें[2]। मातापित्यांच्या सुरवाडें । वार्डेकोडें वाढिन्नला ॥२१॥ पित्याचे वृत्तीसी अवलंबून । करिता झाला अनुष्ठान । शतसहस्र वर्षे जाण । जलपान करून तो असे ॥२२॥ शतसहस्त्र वर्षेवरी । निराहारी तप करी । त्याचिया तपाची थोरी । चराचरीं अनुपम्य ॥२३॥ निर्वैरी समदर्शन । सर्व भूतीं समता पूर्ण । बाह्यांतर इंद्रियनिग्रहण । तें तप जाण पैं श्रेष्ठ ॥२४॥ तप करोनि तापस । शांतीचा नाहीं लवलेश । वृथा दंडमुंडणवेष[3]। परान्नास सोकले ॥२५॥ परान्नी ठेवोनियां चित्त । वैराग्य दाविती मिथ्याभूत । बाह्य शांत अंतरी तप्त । ते जाण निश्चित असाधु ॥२६॥ तैसा नव्हे वैश्रवण ऋषी । तपचि धन थोर जयासी । इंद्र आला सुरगणेंसीं । चतुराननेंसीं त्यापासीं ॥२७॥ म्हणती तुझें तप देखोन । संतोषले देवगण । वर मागसी तो आपण । मी ब्रह्मा जाण पैं देतों ॥२८॥ मग बोले वैश्रवण । मज जरी झालेति प्रसन्न । तरी लोकपाळत्व मागतो आपण । कृपा करोन मज दीजे ॥२९॥ तदनंतर चतुरानन । बोले मधुरवचन । माझ्या मनीं होतें जाण । तें त्वां पूर्ण मागितलें ॥३०॥ तरी यम इंद्र वरुण । कुबेर तूं चौथा जाण । निश्चयेंसीं दिक्पाळपण । तुज संपूर्ण दीधलें ॥३१॥

ब्रह्मदेवाने क्रीडेसाठी त्याला पुष्पक विमान दिले : क्रीडार्थ विमान पुष्पक । देता झाला सत्यलोकनायक[4]। ज्या विमानाची प्रभा समअर्क । त्रिभुवनीं देख असेना ॥३२॥ ऐसें देवोनि वरासी । ब्रह्मा इंद्र सुरगणेंसीं । जावोनियां निजलोकासी । आनंदेंसीं क्रीडती ॥३३॥ मग तो धनेश आपण । ब्रह्मयाप्रति करी विनवण । मज वसावया पाहिजे भवन । कोणाचें हिरोन न द्यावें ॥३४॥ परासी न द्यावें दुःख । परपीडेपरीस नाहीं पातक । यालागीं साधु सज्ञान लोक । प्राणांतीं दुःख न देती ॥३५॥

वैश्रवणाच्या मागणीप्रमाणे ब्रह्मदेवाने त्याला मयासुरनिर्मित लंका दिली : याकारणें स्वामिनाथा । कृपाळुवा कृपावंता । मज भोगार्थ नगर तत्वतां । आपण आतां पैं द्यावें ॥३६॥ ऐकोनि पुत्राचें वचन । संतोषोनि बोले चतुरानन । म्हणे मयासुरें केले निर्माण । लंकाभवन अति रम्य ॥३७॥ तेथें राक्षस होते निवासी । ते विष्णुभयें त्यजून पुरीसी । गेले असती पाताळासी । नगररक्षणासी कोणी नाहीं ॥३८॥ ते स्थळीं जावोनि आपण । करावें त्रिकूटाचें रक्षण । जे लंकेसीं परिघ जाण । समुद्र पूर्ण पैं असे ॥३९॥ ऐसिये लंकेप्रति ।

शब्दार्थ - १. निंदितात, २. त्याच प्रकारे, ३. संन्याशाचा वेष, ४. ब्रह्मा.

विचरावें स्वानंदस्थितीं । मग तो कुबेर शीघ्रगतीं । त्रिकूटीं वस्ती करिता झाला ॥४०॥ जरी लंकेसी देऊं आणिक उपमा । अमरावती न शके सीमा । जिणें ठेंगणें केलें व्योमा[1] । उंचपणें महिमा न नर्णवे ॥४१॥ तें लंकेसीं नांदे वैश्रवण[2] । विमानीं बैसोनि आपण । गंधर्व करिती गायन । अप्सरा वर्तन करिताती ॥४२॥ बंदिजन[3] कीर्ति वर्णती । सेवकजन वेत्र घेउनि हातीं । कलिकाळाच्या माथां टोले देती । दुर्धर शक्तीं आगळी[4] ॥४३॥ ऐसा तो वैश्रवण । पुष्पकविमानीं बैसोन । मातृपितृदर्शनालागून । नित्य लंकेहून येतसे ॥४४॥ रसाळ कथा रामायण । वाल्मीकमुखींचें निरुपण । श्रोतीं देवोनि अवधान । कथानुसंधान परिसावें ॥४५॥ एका जनार्दना शरण । झालें वैश्रवणाख्यान । पुढें गोड असे कथन । कृपा करून पहावें ॥४६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां वैश्रवणाख्यानं नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥ ओंव्या ॥४६॥

## अध्याय चौथा

॥ श्रीसच्चिदानंदाय नमः ॥

### सुकेशाची जन्मकथा

**श्रीविष्णूंनी रावणाचा वध का केला असा रामांचा अगस्तिमुनींना प्रश्न :** ऐकोनि अगस्तीचें वचन । कर जोडोनि रघुनंदन । विनीतवृत्तीं करोनि नमन । काय आपण बोलत ॥१॥ अगा ये अगस्ति महामुनी । पूर्वी लंकादुर्गभवनीं । राक्षस वसती हें तुमच्या वचनीं । आजि म्यां श्रवणीं ऐकिलें ॥२॥ ब्रह्मादिकांचा नियंता । चराचर वर्ते ज्याचिये सत्ता । यज्ञरूप जो अयोनिजेचा[5] भर्ता । डोलवी माथा ऋषिवाक्यें ॥३॥ कुंभोद्भवाच्या वचनासी । ऐकोनि विस्मय श्रीरामासी । म्हणे स्वामी मांसभक्षक कपटवेषी । राक्षस लंकेसीं वर्तती ॥४॥ पुलस्तिवंशीं राक्षस झाले । हें तुमचेनि मुखें ऐकिलें । रावणकुंभकर्ण जन्मले । प्रहस्तादि विकटादिक ॥५॥ आणि रावणाचे सुत । होते पराक्रमवंत । याहूनि ते राक्षस बळवंत । किंवा अशक्त सांगावें ॥६॥ अगा स्वामी महामुनी । तुम्हीं समुद्र प्राशिला आचमनीं । तयांचें नाम तयांची करणी । मजलागूनी सांगावी ॥७॥ तयां पूर्वज कोण । वर देता काय देखोन । तया विष्णूच वधी काय कारण । तें समूळ निरूपण मज सांगा ॥८॥ हे कथा ऐकावयासी । उल्लास उपजतो मानसीं । कृपा करोनि तुम्ही ऋषी । मजपासीं सांगावें ॥९॥

**मुनी त्या प्रश्नाने चकित, त्यांच्याकडून रामस्तुती :** ऐकोनि श्रीरामवचन । अगस्ति झाला विस्मयापन्न । म्हणे वेदांसी न कळे महिमा जाण । तो तूं ब्रह्म पूर्ण श्रीरामा ॥१०॥ तूं चिदाकाशीं चिद्धन । तूं योगियांमानसींचें चिद्रत्न । तूं सुखसागरींचें सुधापान[6] । तूं निजजीवन संतांचें ॥११॥ श्रीरामा तूं आदीचा आदी । तूं मोक्षाची मोक्षसिद्धी । तूं निधीचा परमनिधी । तूं समाधि श्रीरामा ॥१२॥ तूं तपाचें परम तप । तूं भक्तांचा परम दीप । तूं सदाशिवहृदयींचा जप । तूं सुखस्वरूप सर्वांसी ॥१३॥ ध्येय ध्याता आणि ध्यान । तयांहून अससी भिन्न । सच्चिदानंद हें अरुतें[7] जाण। तूं परेहून परात्पर ॥१४॥ निर्गुण होत्साता अवतार धरिसी । तूं अकर्मा होऊनी कर्मे करिसी । अभोक्ता भोग भोगिसी । तुझें निजमायेसी हें न कळे ॥१५॥ ऐसें असोनि रघुनाथा । आमुचे मुखींहून इच्छिसी कथा । तुझा महिमा न कळे तत्वतां । परी वचन सर्वथा नुल्लंघीं तुझें ॥१६॥

शब्दार्थ – १. आकाशाला, २. कुबेर, ३. भाट, ४. मोठी, ५. सीतेचा, ६. अमृतप्राशन, ७. अलीकडे.

सृष्टिरक्षणार्थ ब्रह्मदेवाकडून भूतांची निर्मिती : पूर्वी विष्णूचे नाभिकमळीं । ब्रह्मा उपजला कमळदळीं । तेणें सृष्टिसर्जनाचे[1] काळीं । भूतें निर्मिली अनेक ॥१७॥ तयां म्हणे चतुरानन । तुम्ही सृष्टीचें करा रक्षण । एक म्हणती करूं रक्षण । ते रक्षोगण पैं केले ॥१८॥

प्रजापतिस्तु तानाह सत्वांस्तु प्रहसन्निव । बभाष वाचा यत्नेन रक्षध्वमिति मानवाः ॥१॥

रक्षण करणारे ते राक्षस व पालन करणारे ते यक्ष या नावाने प्रसिद्ध झाले : प्रजापति म्हणे भूतांसी । तुम्हीं रक्षावे सृष्टीसी । येर म्हणती आज्ञा शिरसीं । रक्षूं सृष्टीसी स्वामिनाथा ॥१९॥ जे बोलिले करूं रक्षण । तयांचेनि मुखें तयांसी जाण । नाम ठेविलें रक्षोगण । भूताचें रक्षण करिते झाले ॥२०॥

रक्षाम इति यैरुक्तं राक्षसास्ते भवंति वै । यक्षाम इति यैरुक्तं ते यक्षाः संभवंति वै ॥२॥

सृष्टि रक्षूं म्हणोनि बोलिले । तेणें नांवे ते राक्षस झाले । तयांचे बोलणें तयां फळलें । करूं लागले निजकर्मा ॥२१॥ यक्षाम गेले बोलून । ते झाले यक्षगण । चतुराननवचन प्रमाण । यक्ष अभिधान तयां झाले ॥२२॥

सुकेशाची जन्मकथा : तेथें हेति प्रहेति राक्षस । दोघे बंधु अति कर्कश । तयांचें कुळीं मधुकैटभांस । जन्मप्रकाश पैं झाला ॥२३॥ प्रहेति अति धार्मिक तेथ । महावैराग्यउदासभूत । दार गृह नांगीकारित । परमेश्वररत पैं झाला ॥२४॥ दुसरा हेति दारागृहार्थी । अत्यंत आसक्ति तयाचे चित्तीं । प्रश्न करी ये काकुळती । ऋषिमुनीं प्रती मागे कन्या ॥२५॥ मग काळाची भगिनी राक्षसी । भया नामें अतिकर्कशीं । तिणे आपुली कन्या हेतीसी । विधिपूर्वक दीधली ॥२६॥ हेति राक्षस स्त्रीसमवेत । कामी होऊन आसक्त । गृहाश्रमीं असे वर्तत । तंव एक सुत तया झाला ॥२७॥ विद्युत्केश नामें प्रख्यात । अत्यंत तेजस्वी बळवंत । अग्नीसारखा उग्र भासत । दिवसेंदिवस तेथें वाढिन्नला ॥२८॥ दिसे अत्यंत तरुण । रूपरेखागुणलक्षण । ठाणमाणगुणलक्षण । शोभा संपूर्ण शोभत ॥२९॥ मग हेति देखोनि पुत्रासी । झाला अत्यंत संतोषी । करावया पुत्रविवाहासी । कन्याविचारणेसी लागला ॥३०॥ तंव संध्या नामें राक्षसी । जाऊन तिचिया गृहासी । कन्या मागे निजपुत्रासी । अवश्यतेसीं दीधली ॥३१॥ संध्येची कन्या अति सुंदर । संध्यारागासारिखें शरीर । तियेसी विद्युत्केश वर । लग्न सत्वर लाविलें ॥३२॥ मग तीं दोघें जणें । क्रीडा करिती वनोपवने । जैसें शचीसहित[2] सहस्रनयनें[3] । नाना स्थानीं विचरिजे ॥३३॥ ऐसे बहुत दिवस लोटले । तंव पुढें काय वर्तलें । एके दिवशीं क्रीडेसी गेले । मंदरागिरिपर्वतीं ॥३४॥ तेथें ऋतुस्नात झाली । भर्तारा व्यवस्था कळों आली । क्रमिलें दिनत्रय तें काळीं । ऋतु दिधला चवथे दिवसीं ॥३५॥ उदरीं प्रवेशतां रेत । गोठोनियां शुक्रशोणित । गर्भ संभवला त्वरित । प्रसवली सुत तत्काळ ॥३६॥ पर्जन्य वर्षे जळधारीं । तोय प्रसवे सागरीं । पुनरपि मेघमुखेंकरीं । पृथ्वीवरी वर्षत ॥३७॥ तैसें तियेसी झालें । विद्युत्केशवीर्यातें धरिलें । पुनरपि तें त्यागिलें । मंदरागिरीं श्रीरामा ॥३८॥ तें बाळक शैलशिखरीं । अंगुष्ठ घालोनि मुखामाझारीं । चोखी चुरचुरां रुदन करी । जेविं अंबरीं घन गर्जे ॥३९॥ तंव भवानीसहित त्रिपुरारी । आरूढोनि गोवाहनांवरी[4] । क्रीडा करितां वनांतरीं । बाळकावरी दृष्टि पडली ॥४०॥ उमा विनवी महेशासी । बाळक अपूर्व तेजोराशी । कोणें त्यागिलें अवगुणेंसीं । कीं पुत्र मूळेसीं लागला ॥४१॥ किंवा जननीस झाले भारी ।

---

शब्दार्थ - १. सृष्ट्युत्पतीच्या वेळी, २. इंद्राणी (इंद्रपत्नी) सह, ३. इंद्र, ४. नंदीवर.

म्हणोनि त्यागिलें वनांतरीं । याच्या त्यागाची नवलपरी । मज त्रिपुरारी वाटते ॥४२॥ उचलोनि उत्संगावरी[1] घेतलें । उमेनें तया चुंबन केलें । स्तन पाजून करें कुरवाळिलें । कृपेनें पाहिलें निजदृष्टीं ॥४३॥ अमर करोनियां त्यासी । महादेवें दिधले वरासी । वाढता झाला अति वेगेंसीं । दिवसेंदिवसीं पैं अधिक ॥४४॥ मग तो त्र्यंबक त्रिपुरारी । वसविता झाला गगनोदरीं । गंधर्वनामें भ्रमत नगरी । राक्षसात्मजाकारणें ॥४५॥

पार्वतीचा सुकेशाला वर : उमा म्हणे राक्षसात्मजा । जैसा तूं वाढलासी वोजा । तैशाचि होती तुझ्या प्रजा । ऐसा शैलजा[2] वर दिधला ॥४६॥ विद्युत्केशापासून उत्पन्न । म्हणोनि सुकेश नामधारण । शिवसेवें नित्य सावधान । राक्षस जाण पैं असे ॥४७॥ हिंडे त्रैलोक्याभीतरीं। क्रीडा करी वनांतरीं । मागुता येत जेथें त्रिपुरारी । दर्शनगजरीं राक्षस ॥४८॥ जैसा अमरेश शचीसहित । वनोपवनीं क्रीडा करीत । तैसा तो राक्षस हिंडत । मागुता येत येथें पिनाकपाणि[3] ॥४९॥ श्रीरामायणीं ऋषिनिर्मित । उत्तरकांडकथामृत । सज्जनीं सेवावें सावचित्त । श्रवणद्वारेंकरोनी ॥५०॥ श्रीरामकथा द्रुम[4] केवळ । त्यावरी आरूढ वाल्मीक कविकोकिळ । टाहो करितसे रसाळ । श्रीराम येणें शब्दकल्लोळें ॥५१॥ एका जनार्दना शरण । पुढें गोड आहे निरुपण । श्रीरामकथा परम पवन । श्रोतीं अवधान पैं दीजे ॥५२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सुकेशजनमकथनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥ ओंव्या ॥५२॥ श्लोक ॥२॥ एवं ॥५४॥

## अध्याय पाचवा

॥ श्रीरघुनंदनाय नमः ॥

### सुमाली, माल्यवंत व माली यांची जन्मकथा

रावणारि म्हणे अगस्ती । तुझेनि मुखें सुकेश उत्पत्ती । वर लाधला शैलात्मजापती । महादेवें प्रीतीं पाळिला ॥१॥ तयाकारणें वस्तीसी । गंधर्व लोक यमपुरासीं । राज्यीं स्थापोनि तयासी । पुढें काय ऋषी वर्तलें ॥२॥ तें सांगावें आम्हांप्रती । तूं कृपाळु कृपामूर्ती । तुजसमान नाहीं त्रिजगतीं । तुझी कीर्तीं न वर्णवे ॥३॥ तुवां प्रशिला अपांपती । तुझेनि विंध्याद्रीसी निद्रास्थिती । तुझेनि सूर्यास मार्गप्राप्ती । तुवां इल्वकवातापी मारिला ॥४॥ ऐसा तुझा अगाध महिमा । वाचा वर्णूं न शके ब्रह्मा । परादि वाचा शिणल्या मज रामा । वर्णिलें तुम्हां न वचे ॥५॥

राक्षसवंशासंबंधी रामांचा अगस्तींना प्रश्न : यालागीं जी ऋषिवर्या । मज झालें परमाश्चर्या । राक्षसवंश महाऔदार्या । शिववरद पावावया किंनिमित्त ॥६॥ मग तो सुकेश आपण । गिरिजापतीचा वर लाहोन । स्वकर्मस्वधर्मीं सावधान । पुढील निरूपण मज सांगा ॥७॥ अगस्ति म्हणे कमलोद्भवजनका[5] । नीरपुरीनायकाच्या[6] प्राणघातका । आम्हां पुससी हें अपूर्व देखा । वाटतसे दातारा ॥८॥

ग्रामणी नामक गंधर्वाने सुकेशाला आपली कन्या दिली : सुकेश धार्मिक जाणोन । ग्रामणी नामें गंधर्व आपण । तपस्तेजें तो दारुण । दुसरा जाण विश्वावसु ॥९॥ तयाचे घरीं कन्या सुंदरी । जैसी कर्पूरगौराची गौरी । नातरी लक्ष्मी विष्णूचे घरीं । तैसी कुमरी तयाची ॥१०॥ देव

शब्दार्थ - १. मांडीवर, २. पार्वतीने, ३. पिनाकधनुष्यधारी शंकर, ४. वृक्ष, ५. ब्रह्मदेवाच्या जनका, रामा, ६. रावणाच्या.

वानती तियेचे गुण । तें ग्रामणी गंधर्वें आपण । सुकेशासी प्रीतीं दिधली दान । विधिविधान पैं केलें ॥११॥ मग तीं दोघे शिववरदेंकरीं । ऐश्वर्यं भोगिती निरंतरीं । स्वर्ग अप्राप्त इतरां भारी । तें सुख गजरीं भोगिती ॥१२॥ स्वर्गी दोघें क्रीडा करिती । गगनीं जेवीं निशापती । किंवा विमानीं शचीपती[1] । तेंवी विचरती पैं दोघें ॥१३॥

त्या दोघांना तीन मुले झाली : तदनंतरें देववतीसी । गर्भ संभवला तियेसीं । तीन पुत्र समान त्रिनेत्रेंसीं । तियेचे कुसीं जन्मले ॥१४॥ त्यांचे केलें जातक कर्मासी । तयांची नावें तूं परियेसीं । सुमाळी माल्यवंत माळी ऐसीं । तुजपासीं सांगितलीं ॥१५॥ दक्षिणाग्नि गार्हपत्य आहवनी । तैसे तेजें शोभती तीन्ही । दिवसेंदिवस थोर होवोनी । पितृभजनीं सादर ॥१६॥ पितृआज्ञें तिघे जण । मेरुशिखरीं तप आचरोन । तपें संतुष्ट चतुरानन । येवोनि आपण बोलत ॥१७॥

तिघांच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन त्यांना ब्रह्मदेवाचा वर : तुम्हीं तप केलें निघोर । तेणें हर्ष मज झाला थोर । आतां काय मागाल तो वर । तुम्हां सत्वर देईन ॥१८॥ हात जोडोनि तयांप्रती । मग तिघे राक्षस विनविती । आम्हीं तिघीं वसावें एकत्रीं । अपार संपत्ती भोगित ॥१९॥ आयुष्य व्हावें आत्यंतिक । वैरी व्हावे आमुचे रंक । आणि प्रताप अधिकाधिक । इतुकें आवश्यक दे आम्हां ॥२०॥ ऐकोनि तयांचें वचन । हांसोनि बोले चतुरानन । जे इच्छा तें दिधलें जाण । सत्य भाषण पैं माझें ॥२१॥ इतुकें बोलोनि प्रजापती । विमानारूढ सत्यलोकाप्रती । गेलियामागें अवनि जापती[2] । काय करिती ते राक्षस ॥२२॥ शिल्पशास्त्रीं अति प्रवीण । ऐसा जो विश्वकर्मा जाण । तयाच्या भवनाप्रति जावोन । करिती स्तवन तयाचें ॥२३॥

त्या तिघांनी विश्वकर्म्याकडून लंकानगरी वसविली : सुकेशपुत्र म्हणती विश्वकर्म्यासी । तुझा महिमा न बोलवे आम्हांसी । तूं केवळ सृष्टिकर्ता सत्यत्वेंशीं । निर्माण करिसी भवनातें ॥२४॥ तुवां सुरवरांकारणें । रचिलीं नानापरी भवनें । नाना मंदिरें नाना पट्टणें । गुह्यस्थानें निर्मिलीं ॥२५॥ तरी आम्हांकारणें समर्था । मंदिर पाहिजे सर्वथा । मेरु मांदार अथवा हिमपर्वता । यांच्या आश्रयानें करावें ॥२६॥ ऐकोनि तयांची वाणी । विश्वकर्मा विचरे मेदिनीं । दक्षिणसमुद्रामाजी दोनी । पर्वत नयनीं देखिले ॥२७॥ पर्वतेंसीं पर्वत समीप जाण । त्रिकूट ऐसें त्यां अभिधान । उंच तीस योजनें विस्तीर्ण । तोय परिपूर्ण सरोवरीं ॥२८॥

लंकानगरीचे वर्णन : मग तो विश्वकर्मा तेथ । लंकानगरी निर्माण करित । भोवतें दुर्ग शोभिवंत । परिघ[3] विचित्र समुद्राचा ॥२९॥ नगरी शोभे हाटकवर्णं[4] । हाटवटिया शोभायमान । हुडे अटोळिया[5] सप्तखण । माजी दुखणें बहुवस ॥३०॥ चहूं दिशासीं चार दारवंटे । आगडा[6] सांखळ्या वज्रकपाटें । परवीरांचे हृदय फुटे । देखोनि नेटें ते काळीं ॥३१॥ तोरणें मखरें बहुवस । माजी शोभती मुक्तघोंस । द्राक्षामंडपछाया मार्गस्थांस । विश्रांतीस पैं देखा ॥३२॥ देखोनियां लंकेची थोरी । लाजे अमरावती हात चुरी । भोगावती दडाली पाताळविंवरीं । कैलासही सरी ते न पवे ॥३३॥ करावें लंकेचें वर्णन । कथा विस्तारेल अति गहन । त्याहिमाजी मी अपुरतें दीन । बुद्धिहीन पैं असें ॥३४॥ यालागीं जी करावी क्षमा । जैसें बालक नेणे शुभा-शुभ कर्मा । तयावरी जनकजननीचा प्रेमा । तया सुखासी सीमा पैं नाहीं ॥३५॥ मग तो विश्वकर्मा तयांप्रती । सांगता झाला श्रीरघुपती । तुम्हीं करावी तेथें वसती । लंका नाम नगरींसीं ॥३६॥

शब्दार्थ - १. इंद्र, २. रामचंद्रा, ३. घरे, ४. सोन्याच्या कांतीने, ५. उपरमाड्या, ६. खंदक.

नर्मदानामक गंधर्वस्त्रीनें त्या तिघांना तीन कन्या दिल्या : याउपरी रजनीचर तिघे जण । वसविते झाले लंकाभवन । नर्मदा नामें गंधर्वी जाण । तिघी कन्या तिये घरीं ॥३७॥ ऱ्ही श्री कीर्ति तिघी बहिणी । नर्मदा गंधर्वी त्यांची जननी । देती झाली राक्षसांलागोनी । अनुक्रमेंकरोनी राघवा ॥३८॥ तिघे गृहस्थ होऊन । तिघी स्त्रियांसीं विराजमान । क्रीडती वनोपवन । जेंवी मघवा[1] अप्सरांसीं ॥३९॥

तिघांचा वंशविस्तार : आतां तयां तिघांची वंशोत्पत्ती । सांगेन तुज जानकीपती । माल्यवंताची स्त्री सुकृती । तिसी सहा पुत्र एक कन्या ॥४०॥ वज्रमुष्टि विरूपाक्ष दुर्मुख । चवथा सुप्तघ्न पांचवा यज्ञकोप देख । मधुमंत ऐसें षट्क । सातवी कन्या अनळा पैं ॥४१॥ आतां सुमाळीपासाव उत्पत्ती । ऐकें गा ये धरणिजापती[2] । तयाची भार्या कुसुमावती । चंद्रासारिखें मुख जिचें ॥४२॥ सुमाळिवीर्यें जाणा । तियेचे उदरीं संताना । तेरा पुत्र तिघी कन्या । त्यांच्या नामाभिधाना अवधारीं ॥४३॥ प्रहस्त अंकपन विकट । कंकपत्र धूम्राक्ष कालिकामुख । सुपार्श्व महामती देख । घस प्रघस भासकर्ण ॥४४॥ पुण्योत्कट बळाहक । कैकसी शुचिस्मित एक । कुंभीनसी तिसरी देख । त्रयोदश पुत्र तिघी कन्या ॥४५॥ आतां माळीचे संताना । सांगतसें पद्मिनीरमणा[2] । तयाची स्त्री वसुमती नाम्ना । देखोनि वदना शशी विटे ॥४६॥ माळीचेनि वीर्यें संभूत । सुमतीस झाले चवघे सुत । तयांचीं नामें विख्यात । अनळ अनिळ हंस व संपाती ॥४७॥ हे चवघे राक्षसपुत्र । बिभीषणाचे मंत्री पुण्यवंत । यांसही झाले बहुसाल पुत्र । एकैकशत एकैका ॥४८॥ यांचे भयेंकरीं जाण । काळ तोही कंपायमान । शचीपति तेथें बापुडें दीन । दुर्धर अंगवण पैं यांची ॥४९॥

माळीच्या पुत्रांच्या उन्मादानें देव व ऋषी त्रस्त : हे अवलोकिती ऊर्ध्वदृष्टी[3] । तंव हिमकर धाक धरी पोटीं । भेणें दिग्गज लंघिती द्वीपांच्या शेवटीं । यांशेवटीं वीर नाहीं ॥५०॥ ययांचे भयेंकरून । मुनि ऋषी कंपायमान । विध्वंसिती महायज्ञ । जप ध्यान तेथें कैंचें ॥५१॥ ब्रह्मवरदें होवोनि उन्मत्त । सुरासुरां त्रास देत । यांचे दृष्टीस जो वीर पडत । तो पावत यमपुरा ॥५२॥ हे आपुले भुजबळेंसीं । स्वइच्छे हिंडती पृथ्वीसीं । ययांचिये अंगवणेंसीं । इंद्र तुळणेसी न पावे ॥५३॥ पुढिले अध्यायीं निरूपण । समस्त सुरगण मिळोन । प्रार्थितील शैलजारमण[4] । दीनवदन होउनी ॥५४॥ एका जनार्दना शरण । श्रीरामें रम्य रामायण । वदनीं वदविता श्रीजनार्दन । पुढील निरुपण अतिरम्य ॥५५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सुमालिमाल्यवंतमालिजन्मकथनं नाम पंचमोऽध्यायः ॥५॥ ओंव्या ॥५५॥

## अध्याय सहावा

॥ श्रीधरणिजापतये नमः ॥

### राक्षस व विष्णूचे युद्ध

इल्वलारी[5] म्हणे जामदग्निजिता । कमलोद्भवजनका ऐकें पूर्वकथा । वर देता तयांसी सृष्टिकर्ता । त्यासही तत्वतां न गणिती ॥१॥ वरदें उन्मत्त होवोन । करिते झाले अन्योन्य[6] । ऋषींस दुःख देऊन । यागविध्वंसन पैं करिती ॥२॥

राक्षसांच्या उन्मत्तपणामुळे त्रस्त होऊन ऋषिमंडळी शंकराकडे आली, शंकरांची प्रार्थना : ऐसे राक्षसभयेंकरीं । विप्रीं कडे कुमर हातीं क्वारी[7] । यज्ञपात्रें स्त्रियांचे शिरीं । कैलासपुरी ठाकिली

शब्दार्थ – १. इंद्र, २. सीतापते, ३. वर दृष्टी करून, ४. शंकर, ५. अगस्ती ऋषी, ६. अनुचित गोष्टी, ७. मुलगी.

॥३॥ आले वृद्ध थोर थोर । सपत्नीक अपत्नीक विधुर । तपें जर्जर झालें शरीर । ब्रह्मचारी थोर तेथें आले ॥४॥ आले मौनी दिगंबर । माथां जटा वल्कलांबर । तपोधन[1] थोर थोर । भगवी कापडी येते झाले ॥५॥ राक्षसभयेंकरोनि ऋषी । येते झाले महेशापाशीं । विनविती स्वामी शरणागतासी । रक्षीं रक्षीं म्हणोनियां ॥६॥ कपर्दिना त्रिलोचना[2] । कामारि[2] त्रिपुरदहना । गंगाधरा पंचवदना । दीनजना रक्षावें ॥७॥ गजमुखजनका शैलजापती । शशिशेखरा सर्वांगविभूती । नंदिवाहना वासुकी शोभती । भक्तांप्रती कृपाळुवा ॥८॥ हात जोडोनियां तुजप्रती । आम्ही करितसो विनंती । ब्रह्मवरदें राक्षस मंदमती । दुःख देती ब्राह्मणां ॥९॥ भक्तपति पार्वतीरमण । प्रजांतें करिताती दंडन । निरपराध्यांतें अपराध ठेवून । त्यांतें ताडन पैं करिती ॥१०॥ हिंरोनि इंद्राचे अधिकार । स्वर्गीं क्रीडती जैसे इंद्र । म्हणती आम्हीच ब्रह्मा विष्णू रुद्र । यम कुबेर पैं आम्ही ॥११॥ ऐसे माळी सुमाल्यवंत । वरदें होवोनि उन्मत्त । संग्रामीं बोलती पुरुषार्थ । अति गर्वित अभिमानें ॥१२॥ तुजवांचोनि गंगाधरा । आम्हां सोयरा नाहीं दुसरा । आमच्या विपत्ति सांगतां चतुरा । लज्जा अंतरा येतसे ॥१३॥ आतां आम्हां अभय द्यावें । राक्षसभय निवारावें । गाई ब्राह्मणां स्वस्थ करावें । यश मिरवावें तिहीं लोकीं ॥१४॥

शंकरांनी सर्वांना विष्णूंकडे पाठविले : ऐकोनियां तयांचें वचन । संतोषला शैलजारमण । मृदु मंजुळ शब्देंकरून । काय आपण बोलत ॥१५॥ मी न मारीं तयांसी । माझेनि मृत्यु नाहीं तयांसी । जरी मज पुसतां तुम्ही ऋषी । तरी उपाय यासी सांगेन ॥१६॥ ऐकोनि महादेवाचें वचन । आनंदले तपोधन । जी स्वामी कृपा करून । दीनजन रक्षावे ॥१७॥ शिव म्हणे तयांसी । तुम्हीं जावें विष्णूपासीं । सकळ सांगावें वृत्तांतासी । तो तुम्हांसी रक्षील ॥१८॥ जैसे रोगी रोगें पीडिले । उपरी धन्वंतरीचें दर्शन झालें । तेणें शब्दरसायनें हरिलें । कुपथ्यभय देहीचें ॥१९॥ शिववचनीं संतोषोन । मिळोनि सकळही ऋषिजन । जयजयशब्दें गर्जोन । ऊर्ध्वगमन तिहीं केलें ॥२०॥ जैसा उगवोनि तमारी[3] । निशी पळे भयेंकरीं । तैसे ऋषींस भय भारी । ते कामारिवचनें[4] निरसिलें ॥२१॥

विष्णूस शरण जाऊन त्याची स्तुती : आले विष्णूस शरण । करिते झाले साष्टांग नमन । स्तवन आदरिलें गुणवर्णन । कर जोडून ते काळीं ॥२२॥ जयजयाजी जगद्गुरू । जयजयाजी निर्विकल्पतरू । जयजयाजी तुझा पारू । नेणे विधाता श्रुतिशास्त्रें ॥२३॥ जयजयाजी गुणातीता । जयजयाजी श्रीअनंता । जयजयाजी सद्गुरु अच्युता । देशकाळता तुज नाहीं ॥२४॥ तूं निर्गुण निराकार । तूं निष्कर्म निरुपचार । तो तूं होवोनि साकार । नाना अवतार धरिसी ॥२५॥ निजसामर्थ्यें सृष्टि करी । सृजी पाळी संहारी । तो तूं मेघश्यामरूपेंकरीं । नंदाघरीं अवतरसी ॥२६॥ धरोनियां नाना वेष । खेळ खेळसी असमसाहस । तूं पूर्णब्रह्म अवतारपुरुष । योगिमानसमोहक ॥२७॥ शंख चक्र गदा धरोनि करीं । घेवोनि पीतांबराची उत्तरी । वैजयंती रुळे वक्षःस्थळावरी । द्विजपाद उरीं वाहसी ॥२८॥ सुंदर सरळ नासापुट । शोभती बाहू बाहुवट । चरणीं नूपुरांचा बोभाट । अंदू नेटें पैं गर्जे ॥२९॥ ऐसी सांवळी सुनीळ मूर्ती । देखोनि ऋषि दंडवत करिती । म्हणती स्वामी लक्ष्मीपती । राक्षसीं थोर गांजिलें ॥३०॥

राक्षसांविषयी विष्णूंजवळ तक्रार : रजनीचर म्हणसी कोण । सुकेश सुमाळीचें संतान । ब्रह्मवरदें उन्मत्त होऊन । अन्योन्य पैं करिती ॥३१॥ ऋषींचें आश्रम भंगिले । यज्ञादिक्रिया विध्वंसूं

---

शब्दार्थ - १. मोठमोठे तपस्वी, २. शंकरा, ३. सूर्य, ४. मदनाचा शत्रू शंकर त्याच्या भाषणाने.

लागले । ऋषीश्वर त्रासिते झाले । अतिभयेंकरोनियां ॥३२॥ तेणें भयेंकरीं जाण । आम्ही आलों तुज शरण । शरणागतां अभयदान । कृपा करोन पैं दीजे ॥३३॥ आणिक एक कमळापती । राक्षस वसती लंकेप्रती । दुर्गबळें त्रास देती । उच्छेदिती देवांसी ॥३४॥ लंकादुर्ग अति गूढ । भोंवता समुद्राचा आगड[1] । बुरजोबुरजीं यंत्रांचा जोड । परदळा अवघड पै लंका ॥३५॥ ऐसिये लंकेमाझारी । सुकेशपुत्रदुराचारी । वरदें उन्मत्त तयांवरी । कवणाचें कांही न चालेचि ॥३६॥ तयांच्या भेणें आम्ही समस्त । महादेवापासीं गेलों त्वरित । तो म्हणे मी राक्षसां प्रतिपाळित । माझेनि मृत्यु त्यां नाहीं ॥३७॥ मी सांगतों उपायासी । तुम्ही शरण जा विष्णूसी । तेणें वचनें आम्ही तुजपासीं । यथार्थैसीं पैं आलों ॥३८॥ तुजवाचोंनि तारिता। आणिक नाहीं जगन्नाथा। तुवां अभय देवोनि आतां । राक्षसांतें मारावें ॥३९॥ आपुले चक्रेंकरोनी । राक्षसांचीं शिरें छेदोनी । पाठवावीं यमपुरीलागूनी । रहावया अनुदिनीं पैं तेथें ॥४०॥ तुझेनि प्रतापकिरणेंकरीं । राक्षसनिशी[2] पळेल दूरी । तुजवीण न दिसे कैवारी । शरणागतांवरी कृपा करीं ॥४१॥

**श्रीविष्णूंचे ऋषींना अभयदान :** ऐकोनि ऋषींचें वचन । संतोषला श्रीजनार्दन । तयांप्रति काय आपण । बोलता झाला ते काळीं ॥४२॥ ऋषि हो तुम्ही श्रमलेती । राक्षसीं बहु गांजिलेती । भय सांडोनि आश्रमाप्रती । सुखें वस्ती करावी ॥४३॥ सुकेशपुत्रांतें मी जाणें । तयां वर दिधला चतुराननें । तिहीं मरणा दिधलें आवंतणें[3]। तपोधन दुःखी करोनि ॥४४॥ स्थानभ्रष्ट केलें देवांसी । तिहीं दंडिलें प्रजांसी । विध्वंसिलें यागांसी । मोडिलें आश्रमासी ब्राह्मणांच्या ॥४५॥ तयांच्या वधाकारणें । मज अजन्म्या जन्म घेणें । अकर्म्यासी कर्म करणें । निर्गुणासी होणें सगुण पैं ॥४६॥ तुम्हीं जावें आश्रमाप्रती । स्वधर्मकर्म करा मजप्रीत्यर्थीं । सर्वभूतीं दया शांती । येणें यशकीर्ती होय तुम्हीं ॥४७॥ ऐकोनि श्रीविष्णूचें वचन । ऋषि शिरीं वंदोनि जाण । जयजयशब्दें प्रदक्षिणा । गर्जना करोन निघाले ॥४८॥

**राक्षसांच्या हेरांनी ती वार्ता माल्यवंताला सांगितली :** तेथें गुप्त होते राक्षस दूत । ते माल्यवंताप्रती सांगत । माल्यवंतें बंधु त्वरित । तयांसी वृत्तांत जाणविला ॥४९॥ ऐका बंधु स्वजन हो । देवऋषींचा मिळोनि समुदावो । तिहीं प्रर्थिला कैलासरावो । त्रिनेत्र महादेवो गिरिजापति ॥५०॥ ऋषी म्हणती महादेवासी । राक्षसभयें क्षिती झाली क्लेशी । तुम्हीं वधावें तयांसी । म्हणोनि पायांसी लागले ॥५१॥ महादेव म्हणे तयांप्रती । माझे स्थापित राक्षस असती । माझेनि हातें न मरती । शीघ्र विष्णूप्रती तुम्हीं जावें ॥५२॥ तुम्हीं विष्णूस जावें शरण । तो जाणे भविष्य वर्तमान । हें जग तया अधीन । तो स्वामी पूर्ण विश्वाचा ॥५३॥ समस्त मिळोनि आलेति येथ । तैसेंचि तुम्हीं जावें तेथ । तो भक्तकृपाळु अनंत । अभय देत भक्तांसी ॥५४॥ सकळही मिळोनि ऋषी । ते गेले श्रीविष्णूपासीं । म्हणती सुकेशपुत्रीं आम्हांसी । अति त्रासासी दीधलें ॥५५॥ तयांचें वचन ऐकोन। विष्णू बोले हास्यवदन । मज ठावें तयांचें उद्धटपण । करीन निर्दळण तयांचें ॥५६॥ तिहीं मर्यादा सांडिली । ब्रह्मवरदें भुली पडली । मी करीन तयांची रांगोळी । तुम्हीं सुखसमेळीं नांदावें ॥७॥ विष्णुआज्ञा घेवोनी । देवऋषी समस्त मिळोनी । प्रवेशते झाले स्वस्थानीं । ऐसी करणी केली देवीं ॥५८॥

**विष्णूच्या सामर्थ्याची राक्षसांना धास्ती :** यासी काय कीजे उपाव । जेणें वश्य होतील देव ।

शब्दार्थ - १. वेष्टन, २. राक्षसरूपी रात्र, ३. आमंत्रण.

मिळोनि राक्षससमुदाव । विचार स्वयमेव करिते झाले ॥५९॥ आम्हां भय नाहीं त्रिपुरारींचें । ब्रह्मा कांहीं न करूं शके आमुचें । एक भय त्या विष्णूचें । त्याप्रति कोणाचें कांही न चाले ॥६०॥ पडिलें समर्थासीं वैर । विष्णु मायालाघवी चतुर । तयातें जिंकिजेल ऐसा प्रकार । अणुमात्र दिसेना ॥६१॥ हरी जयातें अंगीकारी । तयाचा घाव यमशिरीं । श्रीहरी जयातें अव्हेरी । ते संसारीं जीत मेले ॥६२॥ हरिनाम प्रल्हाद स्मरे । तयातें दैत्य पीडी बहु प्रकारें । अरिष्टें रचिलीं महाघोरें । तीं नाममात्रें निरसलीं ॥६३॥ अग्नि विष पर्वतपात । बुडवूं गेले समुद्रांत । शस्त्रें मारितां अंगातें । कोठे पुसत श्रीहरि तो ॥६४॥ प्रल्हाद भक्तचूडामणी । म्हणे जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं । श्रीहरि व्यापक जनीं वनीं । अवनीं गगनीं सदोदित ॥६५॥ असुर पुत्राकडे पाहे । ये म्हणे खांबीं आहे । येरु म्हणे जेथें जेथें पाहें । तेथें तेथें आहे श्रीहरि ॥६६॥ दैत्यें गदा काढोन । खांबा हाणिली क्रोधेंकरून । तंव प्रकटला सिंहवदन । असुराचा प्राण घ्यावया ॥६७॥ असुर धरोनि जानूवरी[१] । रागें उदर तयाचें विदारी । अंत्रमाळा[२] कंठीं धरी । भक्तकैवारी विष्णू तो ॥६८॥

विष्णूशी युद्ध करण्याचा तिघा राक्षसांचा निर्धार : ऐसें माल्यवंताचें वचन । सुमाळी माळी ऐकोन । करिते झाले विचारण । मुख्य नारायण आम्हां वैरी ॥६९॥ येणें देव घातले पाठीसीं । वैर करिसे आम्हांसी । आम्हां संमुख रहावयासी । पुरुषार्थासी न देखों ॥७०॥ बहुसाल मिळती खद्योत । तरी न जिंकवे रवि एक । मार्जार काय व्याघ्रासन्मुख । ठाण मांडोनि राहेल ॥७१॥ पतंग आपुले प्रभेकरून । काय गिळूं शकेल हुताशन । पहा हो धेनूचा नंदन । मदगजासीं मिडेल ॥७२॥ कद्रुतनय[३] बहुतेक । विनतातनय[४] तो एक । त्यातें काय ते मशक । पराभवतील संग्रामीं ॥७३॥ आतां विबुधांतें पराभविजे । विष्णु भेटला तरी सहजें । त्यातेंही रणीं जिंकिजे । हेंचि कीजे विचारण ॥७४॥ मग मेळवोनि समस्त । विचार करोनि निश्चित । युद्धा निघावें त्वरित । दूत सांगत घरोघरीं ॥७५॥ युद्धा निघती रजनीचर । जैसे वन्हीचे स्फुलिंग[५] अपार । यावरी माधव शरतुषार । अति गंभीर वर्षेल ॥७६॥

स्यंदनैर्वारणेंद्रैश्च हयैश्च गिरिसन्निभैः । खरैर्गोभिरथोष्ट्रैश्च शिशुमारैर्भुजंगमैः ॥१॥
मकरैः कच्छपैर्मीनैः विहंगैर्गरुडोपमैः । सिंहैर्व्याघ्नैर्वराहैश्च चामरैः सामरैरपि ॥२॥
रथोत्तमैरुह्यमानाः शतशोऽथ सहस्रशः । प्रयाता राक्षसा नूनं देवलोकं जिगीषवः ॥३॥

राक्षससैन्याचे वर्णन : तेथें राक्षस मिळोनी । सेना असंख्य सज्जूनी । विबुध जिंतावे रणमेदिनीं । यालागोनी चालिले ॥७७॥ तेथे रथांसी नाहीं मिती । रत्नजडित ध्वज शोभती । कोट्यनुकोटी भद्रजाती[७] । मद गळती उन्मत्तपणें ॥६८॥ जैसे महापर्वत । तैसे हस्ती शोभावंत । दांतीं सुवर्णबिंदु रत्नजडित । वरी आरूढ होत रजनीचर ॥७९॥ नाना वर्णांचे उन्मत्त घोडे । त्यांतें देखोनि श्यामकर्ण दडे । पाखरा[८] झळकती तेणें उजेडें । दश दिशा गाढे तेज फांकलें ॥८०॥ खेचरांसि नाहीं मिती । बैल कोण जाणे किती । उष्ट्रीं आरूढले ते न गणवती । लक्षानुलक्ष राक्षस ॥८१॥ शिशुमारीं[९] एक वळंघोन । एकासि सर्प वाहन । एक मगरीं आरूढ जाण । एकां वाहन कच्छप ॥८२॥ एकीं मीन पालाणिले । एक पक्षियांवरी वळंघले । एक सिंहीं सरसावले । एक बैसले वाघांवरी ॥८३॥ एकांचें वाहन सूकर । एका रानबैल अपार । एकांचे वाहन सामर । गणनाविचार शतसहस्रीं ॥८४॥ देवांतें जिंकावयालागून । त्यजिते झाले लंकाभवन । अंगीं

---

शब्दार्थ - १. मांडीवर, २. आंतडी, ३. सर्प, ४. गरुड, ५. ठिणग्या, ६. बाणरूप जलकण, ७. हत्ती, ९. एक जलचर.

बळाचा अभिमान । राक्षसगण निघाले ॥८५॥ रथांचेनि घडघडाटें । भीममातेचें[1] उदर फुटे । नदनायक[2] आंदोळे नेटें । सरिता तडागें शोषली ॥८६॥ गर्वे ते रजनीचर । हातीं कात्या त्रिशूळ तोमर । एकीं घेतलें लहुडीचक्र । एकांचे कट्यार पैं करीं ॥८७॥ एकां हातीं धनुष्यबाण । एकीं पर्वत शिळा पाषाण । एकीं पादपा[3] उपडोन । एकीं गोफणा घेतल्या ॥८८॥ रणोन्मदें ते सुरारी । चालिले लंकेबाहेरी । एक उडाले अंबरीं । एक अंतराळीं चालिले ॥८९॥ लंका सांडोनि माघारीं । राक्षस आले नगराबाहेरी । गर्जना केली निशाचरीं । नाद अंबरीं न समाये ॥९०॥

लंकेतून बाहेर पडताना राक्षसांना अपशकुन : हर्षेकरोनि रजनीचर । चालिले पवनवेगाहूनि थोर । तंव पुढें अपशकुन घोर । वीर दुर्धर देखते झाले ॥९१॥ लंकेसारिखी दुसरी लंका । माड्या गोपुरें अट्टालिका[4] । व्योममार्गी विशाळ देखा । रूप भयानक देखिलें ॥९२॥ भूमी अंतरिक्ष व्यापिलें दिसे । काळासारिखी मूर्ति उग्र भासे । माथां शिर तिये नसे । हातें वेष्टितसे भुजांतें ॥९३॥ उत्पात होती दारुण । तप्त रक्तें पडे पर्जन्य । माजी अस्थींचा वर्षाव जाण । मेघ दारुण वोळला ॥९४॥ अर्णव[5] सांडी मर्यादेतें । महेंद्र डोलविती माथे । भूतळ होऊं पाहे उलथेंपालथें । कळिकाळ तेथें चळीं कांपे ॥९५॥ औट कोटी भूतावळी । मिळालिया तया काळीं । एक आरोळी तये वेळीं । मेघासारिख्या पैं देती ॥९६॥ एक रणगोंधळीं नाचती । एक विकट मुख पसरिती । एक खावें पैं म्हणती । एक दाविती वांकुल्या ॥९७॥ दिवाभीतें मस्तकावरी । फिरती चक्राचिये परी । ज्वाळा वमिती मुखोद्वारीं । तें निशाचरीं देखिलें ॥९८॥

बलोन्मत्तपणाने अपशकुनाचा धिक्कार करून राक्षस पुढे निघाले : राक्षस बळगर्वेकरीं । अपशकुन लेखिती तृणावरी । जो नपुंसक से संसारीं । तया भय भारी अपशकुनांचें ॥९९॥ काळपाशेंकरीं विबुधारीं[6] । बांधिले पशु दावणीभीतरीं । पतंग जैसा दीपावरी । मरणोन्मत्त होवोनियां ॥१००॥ माल्यवंत सुमाळी माळी । मरण विसरोन ते काळीं । सेनासमुदायीं राक्षस बळी । गर्जन करिते पैं झाले ॥१॥ राक्षसेंद्र झाला पुढें । मागें पुढें दळ गाढें । जैसें समर्थाश्रयें भ्याडें । मार्ग पडिपाडें[7] क्रमिती ॥२॥ जसा दाता याचकें वेष्टित ।तैसा राक्षस परिवारसहित । मृतप्राणी यमपुरा जात । तन्न्याय राक्षसां ॥३॥ ऐसें उपराउपरीं । मार्गी सिंहनादकरीं । क्रमिला मार्ग क्षणामाझारी । विश्वात्मा हरि तेथें आला ॥४॥

श्रीविष्णू युद्धासाठी सिद्ध होऊन निघाले : दूत सांगती विष्णूसी । राक्षस आले युद्धासी । ऐकोनि तोषला हृषीकेशी । आनंद मानसीं वोसंडे ॥५॥ श्रीहरि त्वरित उठला । अभेद्य कवच अंगीं ल्याला । तेजें दिनमणि लोपला । दशदिशां पडिला उजियेड ॥६॥ अचुक घेवोनियां बाण । जैसे काळाचे क्रूरगण । भातां भरोनि संपूर्ण । धनुष्य टणत्कारोन सज्जिलें ॥७॥

श्रीविष्णूंचे वर्णन : सुवर्णखड्ग घेवोनि हातीं । अवलोकिता जाहला लक्ष्मीपती । कमळा-सारिखें नेत्र शोभती । मुखीं दंतपंक्तीं हिरियांच्या ॥८॥ शंख चक्रगदाधर । श्यामसुंदर राजीवनेत्र[8] । गळां वैजयंतीचे हार । कांसे पीतांबर विद्युत्प्राय ॥९॥ अंगीं अहिप्रियविलेपन[9] । कस्तूरीचा मळवट पूर्ण । श्यामसुंदर विराज-मान । मनमोहन तो विष्णू ॥११०॥ जैसा कनकाचा गिरी । तैसा संमुख सर्पारी[10] । वरी आरूढोनि श्रीहरी । त्वरेकरीं चालिला ॥११॥ गरुडपाखांचेनि वारें । पितांबर आंदोळे तेथें । जैसें समुद्री लाटांचे भरितें । उपराउपरी येतसे ॥१२॥ राक्षस

---

शब्दार्थ - १. पृथ्वीचे, २. समुद्र, ३. वृक्षाला, ४. उपरमाड्या, ५. समुद्र, ६. देवशत्रू राक्षस, ७. क्रमाने, ८. कमललोचन, ९. सर्पांना प्रिय अशा चंदनाचे विलेपन, १०. गरुड.

यथावयाकरणें । अवतार धरिला नारायणें । देवांचें भय निवारणें । सुखी करणें त्रैलोक्य ॥१३॥ स्वर्गीं देव आनंदत । एक पुष्पवर्षाव करित । एक पवाडे गात । एक नाचत स्वानंदें ॥१४॥ ऐसा तो राक्षसारी । निघाला अतित्वरेंकरीं । ते रूप देखोनि निशाचरी । रानभरी पैं झाले ॥१५॥ एक भयें थरथरां कांपत । एक सरसें सरसावत । एक धैर्य धरोनि राहत । शस्त्रें वर्षत अमित पैं ॥१६॥

राक्षसांचा आवेश : राक्षसशस्त्रें अति तीक्ष्ण । मेदमांसे आरक्त जाण । जैसें वसंतीं पलाशपुष्पेंकरून । तैसे बाण वर्षले ॥१७॥ अगणित सोडोनि बाण । श्रीहरि वेढिला जैसा पर्वत पर्जन्य । लागवेग करितां दारुण । वेगें गर्जन करिताती ॥१८॥ सिंहनादें देती आरोळी । हात घांसिती भूतळीं । म्हणती बळियेरे बळी । भिडा ये काळीं अवघेही ॥१९॥ राक्षसीं श्रीहरि वेढिला । एक म्हणती पुरा झाला । एक म्हणती अझूनि याला । उरी कोठें असेल ॥१२०॥ पुढें कथानिरूपण परम । श्रीहरींचे चरित्रनाम । अगस्ति सांगे ऐके श्रीराम । कथाधर्म अवधारा ॥२१॥ एका जनार्दना शरण । श्रीरामें उत्तरकांड पावन । वदनीं वक्ता श्रीजनार्दन । कथानुसंधान अतिरम्य ॥१२२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां राक्षसविष्णुयुद्धं नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥ ओंव्या ॥१२२॥ श्लोक ॥३॥ एवं ॥१२५॥

## अध्याय सातवा

॥ श्रीअवनिजापतये नमः ॥

### माळी राक्षसाचा वध

पूर्वसंगीं रजनीचरीं । वेढियला तो श्रीहरी । पुढें वर्तलें तें चतुरीं । सावधान ऐकावें ॥१॥ श्रीहरि पर्वतासमान । राक्षस तेथें मेहुडे[1] जाण । श्रीहरी सुटलिया प्रभंजन[2] । दाणादाण राक्षसमेघां ॥२॥ अवकाळींचा पर्जन्य । बळेंविण करी गर्जन । तैसे राक्षस बळहीन । संग्रामा जाण प्रवर्तले ॥३॥ जैसे टोळ आकाशीं । पसरती दशदिशीं । ते टोळ वृक्ष देखोनि मानसीं । उल्लासेंसीं वेढिती ॥४॥ जेंवी मशक पर्वतमाथां । असंख्य बैसती तत्वतां । परी तो भार पर्वतचित्ता । अणुमात्र उपजेना ॥५॥ जैसे मत्स्य सागरीं । क्रीडताती सहपरिवारीं । ते पारधी आकळी जाळियाभीतरीं । तैसें श्रीहरि करूं पाहे ॥६॥

परस्परांचे तुंबळ युद्ध : त्या राक्षसांचें अमोघ बाण । वज्राऐसे अति कठिण । जैसा प्रळयींचा प्रभंजन । भूतगण पैं व्यापी ॥७॥ राक्षसबाणांचा शिरावा । वेढिता झाला त्या माधवा । पुढें जें वर्तलें श्रीराघवा । सांगेन मी अवधारीं ॥८॥ वैष्णवी माया अकळ । घातलें भ्रांतीचें पटळ । रणीं मांडिला कोल्हाळ । वीरीं सकळीं परस्परें ॥९॥ रथ लोटिती रथावरी । कुंजर[3] आदळले कुंजरीं । असिवार[4] असिवारीं । सैन्यसागरीं आवर्त[5] ॥१०॥ ते राक्षस पर्वताकार । हाणिते झाले शस्त्रसंभार । जैसा वर्णांमाजी द्विजवर । प्राणायामबळेंकरीं ॥११॥ शरदाटले भूमंडळीं । तेणें दशदिशां अंधारीं पडली । वीरां वीर तये काळीं । हाणिते झाले आपआपणियांतें ॥१२॥ आपले सैन्य आपण । मारिते झाले राक्षस गण । सर्वेचि करिती गाढ गर्जन । आपणा

शब्दार्थ - १. मेघ, २. वायू, ३. हत्ती, ४. घोडेस्वार, ५. मोठे संकट.

आपण मानवती ॥१३॥ शस्त्रे सणसणां वाजत । जैसा प्रळयकाळींचा वात । दोहीं दळां संघाट[1] होत । वीर गर्जत वाढिवा[2] ॥१४॥

श्रीविष्णूंकडून राक्षसांचा संहार : मग निशाचरांवरी । रागें क्षोभला श्रीहरी । शार्ङ्ग धनुष्य टणत्कारी । नाद अंबरीं न समाये ॥१५॥ राक्षसांच्या शिरांतें । तोडिता झाला क्रोधें बहुतें । जैसा योगेश्वर मायेतें । आत्मज्ञानें निरसी पैं ॥१६॥ सर्वांतक बाण घेउनी करीं । क्रोधें सोडिला दैत्यांवरी । तेणें क्षणमात्राभीतरी । केली बोहरी राक्षसांची ॥११७॥ निशाचर पाडोनि भूमंडळीं । बाण भेदोनि गेला पाताळीं । शेष कांपतसे चळचळीं । कूर्म कळकळीं पैं थाकें ॥१८॥ सवेंचि पांचजन्य त्राहाटिला । नेणों नादें काळ कांपला । दिग्गजांच्या श्रवणबिळां । बधिरता पैं आली ॥१९॥ शशिसूर्य कंपायमान । नक्षत्रें पडती गळोन । मेरुमस्तक आंदोळून । समुद्रजीवन उचंबळलें ॥२०॥ नांदें राक्षसें झालीं वेडीं । समरांगणीं पडली उबडीं[3] । एकां झालीं हडबडी गाढी । एक रोकडीं निमालीं ॥२१॥ सेन्य मारिलें समसकट । रथचक्राचें झालें पीठ । घुरघुरितसे कंठ । प्राण त्यागित रणरंगीं ॥२२॥ जैसें सिंहाचें गर्जन । कुंजरांचा पळे प्राण । तैसें प्राणहत राक्षससैन्य । पांचजन्यनादेंकरीं ॥२३॥ रणनदी वाहे अशुद्धगाढी । राक्षसकरवडें[4] यांची दरडी । समरांगणीं जुंझती कडोविकडीं । तेचि परथडी पावले ॥२४॥ रणवसंत माजला । वीरें वीर रुधिरें न्हाला । तोचि पळस फुलावला । आरक्ततेकरोनी ॥२५॥ रण पडिलें असंख्यात । वीर घायाळ झाले बहुत । तोचि कोकिळांचा रव होत । आलापीत पंचमस्वरीं ॥२६॥ रवि रजनी खंडित । अति वातें समुद्र हेलावत । तैसा श्रीहरि मर्दित । अरिवीरसैन्यातें ॥२७॥

शरभेण यथा सिंहः सिंहेन द्विरदो यथा । द्विरदेन यथा व्याघ्रो व्याघ्रेण द्वीपिनो यथा ॥१॥
द्वीपिना च यथा श्वानः शुना मार्जारका यथा । मार्जारेण यथा सर्पाः सर्पेण च यथा प्लवाः ॥२॥
तथा ते राक्षसाः सर्वे विष्णुना प्रभविष्णुना ॥३॥

शार्ङ्गधनुष्यापासूनि शर । मनोवेगापरीस थोर । सुटले तेणें निशाचर । रणभूमीवर पाडिले हो ॥२८॥ शरभ जैसा सिंह विदारी । सिंह गजातें विदारी । गज व्याघ्र देखोनि दूरी । व्याघ्रा भय चित्याचें ॥२९॥ चित्या श्वाना वैर थोर । एकमेकांचा करिती संहार । श्वानास भीतसे मार्जार । सर्पा मांजर पैं भक्षी ॥३०॥ उरगें[5] भेकातें[6] गिळी जाण । तैसे श्रीहरीचे शर दारुण । राक्षससैन्य करोन भग्न । वीर दारुण पाडियेले ॥३१॥ वीर पाडिले रणमंडळीं । जैसा प्राणी सुषुप्तिकाळीं । नाकीं तोंडीं पडे धुळी । त्याचे तया स्मरण नाहीं ॥३२॥

तीनही राक्षस भयभीत : कोट्यनुकोटी राक्षस । मारोनि विष्णु पावला यश । उरले तिहीं घेतला त्रास[7] । लंकाप्रवेश तिहीं केला ॥३३॥ शंखराजाची ध्वनि भारी । तेणें राक्षसें घाबिरीं । पळोनि प्रवेशलीं पुरी । एकीं मार्गीं प्राण सांडिले ॥३४॥ राक्षससैन्य भंगलें । कित्येक रणीं पडिलें । हें सुमाळीनें देखिलें । क्रोधाचें आले भरतें तया ॥३५॥ मग तो सुमाळी रजनीचर । विष्णूस येवोनि समोर । बोलता झाला साहें माझे शर । तरी मी वीर तुज म्हणेन ॥३६॥

सुमाळी, माल्यवंत यांना पराभूत केले : विष्णूतें हाणित शर । विष्णु निवारी योद्धा चतुर । मग म्हणे तूं राक्षस थोर । संग्रामी धीर धरीं आतां ॥३७॥ श्रीविष्णूनें चाप सज्जिलें । गुणीं शर

शब्दार्थ - १. भेट, २. आवेशाने, ३. अनाथ, ४. राक्षसांची प्रेते, ५. सर्प, ६. बेडकाला, ७. भय.

लाविले । जयां बाणांवरी खेळे । पुट तेजाळ अग्नीचें ॥३८॥ विष्णूचे येतां अग्निमय बाण । राक्षसें केलें खंडण । सोडोनियां आपुले बाण । रवि विष्णू आच्छादिला ॥३९॥ मांडलें रण अति कठिण । राक्षसें सोडिले निर्वाणबाण । रणरंगीं विष्णूस आंवरून । आपण गर्जन करिता झाला ॥४०॥ सुमाळियें दिधली आरोळी । जेंवी विजु तडके मेघमंडळीं । श्रीहरीनें देखोनि ते काळीं । बाण तयावरी सोडिले ॥४१॥ बाण आदळले रथेंसीं । छेदिलें रथांच्या वारुवांसी । वाहटुळीमाजि पत्रें जैसीं । आकाशपोकळीं भोंवत ॥४२॥ सुमाळी होवोनियां भ्रांत । रणामाजि परिभ्रमत । जैसा अटवीं[1] अंध फिरत । जाजावत[2] प्राणी पैं ॥४३॥ रणीं सारथि भंगला । सुमाळी विरथ झाला । श्रीविष्णू यश पावला । देवीं केली पुष्पवृष्टि ॥४४॥ सुमाळी रणीं विमुख । देखोनि माल्यवंत कोपला अधिक । बाण घेतला काळांतक । क्रोधें सोडिता झाला ॥४५॥ तो बाण अति तेजाळ । सूर्यतेजाहूनि सोज्ज्वळ । माळी संधान करी सबळ । तये काळीं अवधारा ॥४६॥ वैरियाचे अमित बाण । विष्णू मध्यें करी खंडण । जैसा पंडित छेदी पाखांडकथन[3] । तेंवी ते बाण तोडिले ॥४७॥ तदनंतरें श्रीहरी । काय करिता झाला ते अवसरीं । संधान सरी राक्षसांवरी । जेंवी अंबरीं घन वर्षे ॥४८॥ कीं ते काळाचेचि दूत । प्रेरिलिया स्थळासी जात । तैसे चालिले गर्जत । राक्षसअंत करावया ॥४९॥ माल्यवंता देहीं भेदले । रुधिरातें प्राशन करिते झाले । सर्प सुधापानीं[4] बैसले । चाटूं निघाले सुरासुरा ॥५०॥ माल्यवंत झाला मूर्च्छाभूत । रथ सारथि अश्व तेथ । न लागतांचि क्षणमात्र । हतोहत[5] पैं झाले ॥५१॥ चाप बाण पडिले रणीं । सैन्या झाली भंगाणी । रजनीचर मूर्च्छा सावरोनी । तत्क्षणीं उठिला ॥५२॥

माळीच्या गदाप्रहराने गरुड मूर्च्छित : हातीं वसवोनियां गदा । करिता झाला महाशब्दा । जैसा सिंह कांपे क्रोधें गदगदां । तेंवी गोविंदा हाणित ॥५३॥ ते गदा गरुडाचे ललाटीं । बैसे जैसा दरिद्री कपाळ पिटी । रुद्र प्रळयकाळीं घोंटी । मायामय सृष्टिरूपातें ॥५४॥ राक्षसगदा अति कठिण । लागतां गरुड मूर्च्छापन्न । रणीं विमुख नारायण । राक्षसगण हरिखले ॥५५॥ देव रणीं पराभविले । श्रीविष्णूस विमुख केलें । गरुडा गदेनें हाणितलें । राक्षसां झालें महासुख ॥५६॥ एक आनंदें नाचती । एक माळीसी वर्णिती । एक भला भला म्हणती । थोर ख्याती त्वां केली ॥५७॥ बंधूचें उसनें घेतलें । विष्णूतें विमुख केलें । समरांगणीं यश आलें । पराभविलें देवांतें ॥५८॥ राक्षस समस्त एकवटूनी । आनंदें गर्जती मेघध्वनी । हें ऐकोनि विष्णूनें कानीं । कृपावलोकनीं उठविलें गरुडा ॥५९॥ श्रीहरीची कृपा जयावरी । तयाचें कोण काय करी । हात उतरितां[6] श्रीहरी । बळ शरीरीं बाणलें ॥६०॥

विष्णूंनी सुदर्शनचक्रानें माळीचा शिरच्छेद केला : गरुडावरी वळंघोनि जाण । हातीं सुदर्शन चक्र दारुण । जयाचें तेज कोटिसूर्यगण । खद्योत होवोन राहिले ॥६१॥ चक्राभेणें कळिकाळ । चळचळां कापे होवोनि निर्बळ । चक्रातें देखोनि समुद्रजळ । मर्यादेतें नुलंघी ॥६२॥ ऐसें चक्र अति दुर्धर । राक्षसाचें छेदोनि शिर । गगनीं भोंवे चक्राकार । देखोनि भास्कर कोपला ॥६३॥ पर्वणी सांडोनि अवकाळीं । राहु येतो आम्हांजवळी । तैसें राक्षसशिर अंतराळीं । भोंवोनि खाली पडिलें ॥६४॥ स्वर्गीं देव आनंदले । पुष्पवर्षाव करिते झाले । एक आनंदें नाचूं लागले । एक गाते झाले हरिनाम ॥६५॥

शब्दार्थ - १. अरण्यांत, २. कष्ट पावेतो, ३. नास्तिकवाद, ४. अमृत पिण्याकरिता, ५. नष्ट, ६. वरदहस्त ठेवताच.

राक्षसांचा आक्रोश आणि पळापळ : येरीकडे रजनीचर । निमाला देखोनि माळी वीर । दुःखें पिटिती करें शिर । पाषाणें उदर पीटिती ॥६६॥ म्हणती अपशकुनाचें झाले फळ । मारिलें आमचें असंख्य दळ । बंधु निर्दळिला सबळ । सेना सकळ पळाली ॥६७॥ आमचें कांहीं न चले येथ । म्हणोनि सुमाळी माल्यवंत । विमुख होवोनि रणाआंत । पुरीं प्रवेशते पैं झाले ॥६८॥ कित्येक सैन्य पळालें । किंचित जें काहीं उरलें । तें पक्षवातें गरुडें संहारिलें । चक्रे तोडिलें शिरातें ॥६९॥ गदेनें कित्येक निमाले । तोमरें कित्येक निवटिले । कांही थोडेबहुत उरले । ते मारिले शस्त्रेंकरीं ॥७०॥ कित्येक बाणें निर्दळून । रणीं पाडिले असंख्य जाण । तेथें भूतावळी[1] मिळोन । मांसभक्षण करिती ॥७१॥ आनंदें नाचती क्षेत्रपाळ । वाद्यें वाजविती वेताळ । शाकिनी डाकिनी करिती गोंधळ । मांसाचा सुकाळ पैं तेथें ॥७२॥ पात्रें भरोनि रुधिर पिती । एकमेकांस प्रीतीनें देती । एकमेकांस हांसती । तिरस्कारिती एकमेकां ॥७३॥ ऐसा संग्राम अत्यद्भुत । श्रीहरि झाला विजयान्वित । पुढें परिसावें सावचित्त । वाल्मीक-वाग्रत्नातें ॥७४॥ वाल्मीककृत रामायण । एकैक अक्षर परम पावन । श्रवणें ब्रह्महत्यादि दोष दहन । कलिमलनाशन रामकथा ॥७५॥ एका जनार्दना शरण । म्हणतां कैंचें दुजेपण । श्रीरामप्रिय रामायण । नाम तारण भवदोषां ॥७६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां माळीराक्षसवधो नाम सप्तमोऽध्याय: ॥७॥ ओंव्या ॥७६॥ श्लोक ॥३॥ एवं ॥७९॥

## अध्याय आठवा

॥ श्रीकमलोद्भवजनकाय नमः ॥

### भीतीने राक्षसांचे पातालगमन

अवनिजापति रघुनंदन । जोडून पाणी[2] करी प्रश्न । अगस्ति तुझेनि मुखें आपण । माळीमरण आयकिलें ॥१॥ पुढें उरले दोघे बंधु । त्यांचा कैसा जाहला वधु । त्यांतें वधिता गोविंदु । किंवा आणिक पैं असे ॥२॥ अगस्ति म्हण श्रीरघुपती । तयां राक्षसां मृत्यु विष्णुहातीं । विष्णुहातें ते मरती । आणिकाप्रती नाटोपती ॥३॥ माळी मारिला ऐकोन । राक्षस मोडले देखोन । माल्यवंत क्रोधायमान । गिरा गर्जोन चालिला ॥४॥ अग्निकुंडासारिखे नेत्र । रागें धनुष्या गुण[3] चढवित । जैसा समुद्र वेळी लंघित । तैसा धांवत राक्षस ॥५॥

माल्यवंताकडून विष्णूंचा उपहास : दूरी देखोनि विष्णूसी । रागें फोडी आरोळीसी । जेवीं कां मेघ आकाशीं । वर्षाकाळीं पैं गर्जे ॥६॥ अगा पद्मनाभा परियेसीं । नीति सांगतों तुजपासीं । तूं धर्मयोद्धा नव्हेसी । ठकवोनि मारिसी वीरांतें ॥७॥ तूं नेणसी शूरधर्म । तुज नाहीं कर्माकर्म । तुज कैंचा संग्रामधर्म[4] । विमुख वीर मारिसी ॥८॥ विमुख मारितां वीर । तेणें तयासी पाप अपार । तया दोषांचें होती डोंगर । अपेश थोर तो जोडी ॥९॥ स्वर्गीं पितृगण कोपती । द्विज देव विमुख होती । कीर्ति होय अपकीर्ती । जाण निश्चितीं गोविंदा ॥१०॥ अपेशें नव्हे स्वर्गगमन । अपेशें होय अध:पतन । अपेश तेंचि पाप दारुण । अपेशें कल्याण न पवेच ॥११॥ तें अपेश तुज आलें । तुवां पळतां राक्षस वधिले । जे रणापासोन चेवलें[5] । त्यातें

शब्दार्थ - १. भूतांचा जमाव, २. हात, ३. दोरी, ४. युद्धनीती, ५. भ्रष्ट झाले.

मारिलें संग्रामीं ॥१२॥ गरुड पळतां तूं पाठीं । बैसला होतासी वळंघोनि पृष्ठी । फिरोनि चक्र हाणिलें क्रोधदृष्टीं । हे कामाठी[1] तुझी नव्हे ॥१३॥

त्याची गर्वोक्ती : तुज युद्धाचें असे आर्त । तरी तूं साहे माझा शरसंपात । आतां धीर धरीं युद्धांत । सावचित्त राहे उभा ॥१४॥ मी माल्यवंत कैसा । पाहें उभा गिरि जैसा । माझे दृष्टीसंमुख सहसा । काळ उभा राहेना ॥१५॥ मी ऊर्ध्व अवलोकीं व्योम । तंव भयभीत रविसोम । मज चळीं कांपतसे यम । माझा पराक्रम अद्भुत ॥१६॥ अगा ये शैलारिअनुजा[2] । आतां पुरुषार्थ पाहें माझा । मी माल्यवंत भेटल्या जुंझा । गर्व तुझा राहेना ॥१७॥

श्रीविष्णूंचे त्याला प्रत्युत्तर : ऐसें ऐकोनियां वचन । काय बोलिला नारायण । म्यां अवतार धरिला याचि कारण । तुमचें दमन करावें ॥१८॥ तुम्ही दुष्ट दुराचारी । तुम्ही नोळखां परनारी । तुम्हीं पीडिले देव भारी । त्याची उसणवारी मी घेतों ॥१९॥ तुम्ही वरदें झालेति उन्मत्त । नोळखां साधु संत म्हंत । तुम्ही पाप आचरलेति बहुत । मी प्रायश्चित देतसें ॥२०॥ संग्राम तेंचि सुक्षेत्र । शरधारा तेंचि महातीर्थ । येथें माधव मी दानपात्र । तुम्हीं जीव देतां न सरावें ॥२१॥ मी देवांचा आज्ञाधारी । त्यांचें वचन माझे शिरीं । मी त्यांचेनि बोले राक्षस मारीं । मी सुखी करीं तयांतें ॥२२॥ मज नाहीं विमुखपण । सकळां संमुख मी जाण । विन्मुखा विन्मुख पूर्ण । मजपासीं मीतूंपण असेना ॥२३॥ माझ्या साधूंचा करिती द्वेष । तयांतें मी निर्दळीं परेश । यालागीं तुम्ही राक्षस । परम क्लेश पावाल ॥२४॥

माल्यवंताचा हल्ला : ऐकोनि विष्णूचें वचन । माल्यवंत झाला क्रोधायमान । अग्निकुंडासारिखे नयन । शक्ति दारुण घेतली ॥२५॥ ते शक्ति अत्यंत दारुण । काढितां कडकडली कडाडून । घंटावळी[3] तेंचि आभरण । नादें गगन कोंदलें ॥२६॥ ते राक्षसें मंत्रोनि टाकिली। ते विष्णूच्या हृदयीं भेदली। जैसी पर्वतीं वीज खडतरली। तैसी लागली हरिअंगीं॥२७॥ तये शक्तीचेनि घायें । देव मूर्च्छित होऊं पाहे । परी आवरोनि धैर्ये । उसणें घेवों आदरिले ॥२८॥ तयाउपरी श्रीहरी । शक्ति आव्हानी[4] बीजाक्षरीं[5]। जियेचे आंतबाहेरी । सहस्रनामें विष्णूचीं ॥२९॥ ऐसी शक्ति अति दारुण । सुटली घोषें गर्जे गगन । निधडे वीर कंपायमान । देवगण भयभीत ॥३०॥ ते शक्ति राक्षसांवरी । टाकिली अति क्रोधेंकरीं । राक्षसे शक्तीतें तोडून अंबरीं । धरणीवरी पाडिली ॥३१॥ कित्येक शक्तिघावें निमाले । कित्येक वीरीं प्राण सांडिले । कित्येक जीव घेवोनि पळाले । लंकापुरी लक्षोनी ॥३२॥ पुनरपि माल्यवंतें । काळतुल्य शूळातें । हाणिता झाला विष्णूतें । तो शूळ जनार्दनातें लागला ॥३३॥ हरिहृदयीं शूळ भेदला। तयावरी मुष्टिघाव झाला । महाशब्द करूं लागला । समरांगणीं राक्षस ॥३४॥

गरुडाच्या पक्षवाताने राक्षससैन्याचा विध्वंस : अरुणानुजास[6] शूळ । राक्षस मारिता झाला तत्काळ । ते वेळीं कोपला विनताबाळ । पक्षवात प्रबळ सोडिला ॥३५॥ गरुडपक्षवातेंकरीं । कित्येक गतप्राण झाले अरी । कित्येक पडले रणसागरीं । कित्येकीं बोहरी पैं झाली ॥३६॥ सैन्य देखोनि भंगलें । थोर थोर वीर पडिले । माल्यवंत सुमाळी काय करिते झाले । तये काळीं अवधारा ॥३७॥ मागें पुढें रण पाहती । तंव नाहीं रथ सारथी । सर्वांची झाली शांती । पक्षवातीं निवारिलें ॥३८॥

विष्णूंच्या धाकाने राक्षसांचे पाताळांत गमन : माल्यवंत सुमाळी रणभ्रष्ट झाले । संग्राम सोडून पळों लागले । धाक धरोनि प्रवेशले । लंकापुरीभीतरीं ॥३९॥ ऐसे ते नक्तंचर[7] । रणीं पाडिले

---

शब्दार्थ – १. पराक्रम, २. इंद्राचा कनिष्ठ बंधू, ३. विष्णू, ३. घागऱ्यांचा समूह, ४. स्थापना करी, ५. मूळमातृकांनी, ६. गरुडास, ७. रात्री संचार करणारे राक्षस.

थोर थोर । जयातें धाकती सुरवर । चरणांतें शरण येती ॥४०॥ अगस्ति म्हणे श्रीरामा । राक्षस मारावया पुरुषोत्तमा । तूं अवतरलासी आम्हां । अत्यंत सुख द्यावया ॥४१॥ विष्णुधाकें ते निशाचर । लंका सांडोनि पाताळविवर । प्रवेशले सहपरिवार । माल्यवंत सुमाळी राक्षस ॥४२॥ पौलस्तीचा वंश राक्षस । झालें रण अतिकर्कश । तेच कुळीं रावण दशशीर्ष । बळनिधि जन्मला ॥४३॥ ऐसी राक्षसांची उत्पत्ती । ऐकें स्वामी श्रीरघुपती । यांच्या वधाकारणें रमापती । आपण अवतार धरिता झाला ॥४४॥ पुढें कथा अति रसाळ । वाल्मीकमुखींचें नाम केवळ । श्रोते हो तुम्ही परिसा सकळ । सावधान होउनी ॥४५॥ एका जनार्दनासी विनवित । श्रोतीं व्हावें दत्तचित्त । पुढील कथानामामृत । सेविजे निर्मुक्त होवोनी ॥४६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां राक्षसपातालगमनं नाम अष्टमोऽध्याय: ॥८॥ ओंव्या ॥४६॥

## अध्याय नववा

॥ श्रीरमाकांताय नमः ॥

### रावण-कुंभकर्णादिंची उत्पत्ती

श्रीराम म्हणे मुनिवरा । माल्यवंत सुमाळी पाताळविवरा । प्रवेशले तयावरी चतुरा । कथा पुढारां सांगावी ॥१॥ अगस्ति विनवी श्रीरामा । तूं अंतर्यामी साक्षी आम्हां । ऐसें असोनि हा महिमा । आमचा थोर वाढविसी ॥२॥ पुढें ते रजनीचर । पाताळीं प्रवेशले सहपरिवार । लपोनि राहिले धाक थोर । भय दुस्तर देवांचें ॥३॥ कोणे एके समयीं । राक्षस विचरती महीं[1] । रसातळमृत्यु लोकीं पाहीं । स्वइच्छेनें हिंडती ॥४॥ अंगकांति अति सुंदर । शोभा शोभे शशिशक्र । सुवर्णकुंडलें मकराकार । विशाल नेत्र आकर्ण ॥५॥ ऐसा सुमाळी राक्षस । मही विचरत सावकाश । तंव एके समयीं कुबेरास । देखता झाला दुरोनी ॥६॥ कुबेर पुष्पकविमानीं । बैसोनि जातां गगनीं । राक्षसीं देखिला नयनीं । भय मनीं धरियेलें ॥७॥ पाताळा गेला पुनरपि जाण । स्वगृहीं असतां सावधान । तंव कन्या देखिली रूपयौवन । राक्षसाचें मन कळवळिलें ॥८॥

**माल्यवंताने आपली कन्या कैकसी हिला पौलस्तीला वरण्यास सांगितले :** माल्यवंत म्हणे कन्येप्रती । ऐक वो एक माझी विनंती । तूं रूपयौवनें गुणवती । वर निश्चितीं तुज पाहिजे ॥९॥ जयाचे घरीं कन्यारत्न । तया चिंता अति दारुण । कोणे काळीं सुस्थिर मन । तया प्राणियाचें पैं नाहीं ॥१०॥ कन्येची होता उत्पत्ती । माता पिता चिंता वाहती । तैसी तूं नव्हेसी गुणवंती । लक्ष्मीची स्थिती तुजपाशीं ॥११॥ माता पिता काय करिती । कन्येसी योग्य वर पाहती । विधिपूर्वक लग्न लाविती । तयांच्या पुण्या मिती नाहीं ॥१२॥ तिन्ही कुळांचे विचारण । शोध करिती ज्ञाते जन । घटित[2] गोत्र नसतां ज्ञान । लग्न तेथें न लाविती ॥१३॥ तरी कन्ये तूं अवधारीं । प्रजापतीचे उदरीं । पुलस्त्यनामा श्रेष्ठ भारी । पुत्र तयाचा पौलस्ति ॥१४॥ पुलस्त्याचा नंदन । पौलस्तिनामा प्रसिद्ध जाण । तयासि त्वां वरावें आपण । पुत्र संतान तुज होईल ॥१५॥ त्या पुत्राचें महिमान । तेजें जैसा शोभे भानु[3] । अथवा अग्निसमान । प्रतापें पूर्ण बळवंत ॥१६॥

**कैकसीचे पौलस्तीच्या आश्रमांत आगमन:** पितृआज्ञा वंदोनि शिरसीं । आनंदे निघाली

शब्दार्थ - १. पृथ्वीवर, २. वधूवरांची जन्मपत्रिका पाहून गुण पाहणे, ३. सूर्य.

कैकसी । पौलस्ति जेथें तपोराशी । त्या आश्रमासी पैं आली ॥१७॥ जोडोनियां दोनी कर । उभी ठेली तयासमोर । तंव तो तपस्वी द्विजवर । काय उत्तर बोलिला ॥१८॥ भयभीत होवोनि मानसीं । उभी ठेली अधोदृष्टीसीं । तंव तियेसी देखोनी ऋषी । बहुत मानसीं संतोषला ॥१९॥ तो विश्रवा ब्राह्मण । तेजें तपें ज्ञानें पूर्ण । मृदु मंजुळ वचन । संतोषोनि बोलिला ॥२०॥ अवो भद्रे तूं कोणाची कोण । कोण पिता काय अभिधान । तुज येथें यावया काय कारण । समूळ कथन मज सांगें ॥२१॥

**तिने आपले मनोगत सांगितले :** ऐसें ऐकोनि ऋषिवचन । कैकसी दोनी कर जोडून । म्हणे स्वामी तूं सर्वज्ञ । आत्मप्रभावें गुण जाणसी ॥२२॥ वचन ऐकोनि पितयाचें । मज येणें झालें साचें । कैकसी नाम या देहाचें । तुम्ही सर्वज्ञ जीवींचें जाणतसां ॥२३॥ ऐकोनि तियेचा शब्द । मुनि ध्यानस्थ झाला स्तब्ध । जाणोनि तियेचा भाव शुद्ध । काय आपण बोलतसे ॥२४॥

**तुला राक्षसपुत्र होतील असे ऋषींचे सांगणे :** अवो चंद्राने अवधारीं । तुज पुत्र पाहिजे तरी । तूं आलीस हे वेळा आसुरी । राक्षस पुत्र तुज होती ॥२५॥ ते बळियाढे दुर्वृत्ती । देवां अत्यंत त्रास देती । क्रूररूपें उन्मत्त होती । जाण निश्चितीं कैकसी ॥२६॥

**आपल्यासारखा धर्मनिष्ठ, तपस्वी पुत्र व्हावा म्हणून कैकसीची प्रार्थना :** ऐकोनि द्विजाचें वचन । हात जोडोन करी विनवण । स्वामी तुम्हांसारिखे नंदन । माझे उदरीं जन्मावे ॥२७॥ तुम्ही शांत दांत संपूर्ण । तपें तेजें अति दारुण । सर्व भूतीं दया संपूर्ण । ऐसें संतान मज देईं ॥२८॥ दुराचारी पुत्र होती । तेणें पितृगण नरकीं बुडती । तयांतें जे पुत्र म्हणती । ते निश्चितीं मंदबुद्धि ॥२९॥ ऐकोनि तियेचें वचन । संतोषला तपोधन । मजसारिखें धर्मिष्ठ जाण । पुत्रनिधान पावसी ॥३०॥ ऋषिवचन वंदोनि शिरीं । तेथेंचि राहिली सुंदरी । कायावाचामनेंकरीं । सेवा तिळभरी न सांडी ॥३१॥

**तिच्या पोटी रावणाचा जन्म :** सेवा देखोनि दारुण । पुत्र जन्मविता झाला आपण । तये काळीं झालें जनन । सावधान अवधारा ॥३२॥ दशशीर्ष विंशति[1] भुजा जाण । दाढा विक्राळ विशाळ वदन । ओष्ठ वीस-आरक्तवर्ण । काया जैसी काजळगिरि ॥३३॥ स्कंधावरी दिसती शिरें । जैसीं पर्वतांची शिखरें । तीहीं अत्यंत भयासुरें । अति उग्र तेज पैं ॥३४॥ ऐसा जन्मतां ते क्षणीं । माता देखती झाली त्यालागोनी । भयानक गजबजोनी । सावधान होउनी पहातसे ॥३५॥

जातमात्रे ततस्तस्मिन्जज्वाल कठिनः शिवः । क्रव्यादाश्चापसव्यानि मंडलानि प्रचक्रिरे ॥१॥
ववर्षू रुधिरं मेघा रटंतो भैरवान्स्वनान् । न प्रकाशति खे सूर्यो महोल्काश्चापि खेऽपतन् ॥२॥
अथ नामाकरोत्तस्य पितामहसमः पिता ॥३॥

**रावण जन्मताच भयानक अपशकुन :** कैकसी ते प्रसूत झाली । भयानक पुत्र प्रसवली । पुढें काय कथा वर्तली । सावधान अवधारा ॥३६॥ जन्म पावतांच राक्षस । तेथे उत्पात झाले बहुवस । भालुवा भुंकती अरण्य उद्वस । तैसें नगर दिसतें झालें ॥३७॥ दश दिशा ज्वाळाकुळित । गीधमंडळी अपसव्य फिरत । पर्जन्य रुधिरें वर्षत । मेघ गर्जत भयानक ॥३८॥ खमंडळीं[2] अद्‌भुत ध्वनी । सूर्य न प्रकाशे गगनीं । नक्षत्रें पडती च्यवोनी[3] । कंप मेदिनीं होतसे ॥३९॥ यानंतरें चतुरानन । पहावया तेथें आला जाण । देखतां दशशीर्ष वीस नयन । जातक[4] आपण वर्तविता झाला ॥४०॥ पेंचद्वय[5] शीर्श दशद्वय[6] नयन । विंशति भुजा तेजस्वी जाण । तयाचें

शब्दार्थ - १. वीस, २. आकाशांत, ३. गळून, ४. मूल जन्मल्यावरचा संस्कार, ५. दहा, ६. वीस.

दशग्रीव अभिधान । आतां कुंभकर्णजनन अवधारा ॥४१॥

कुंभकर्ण, शूर्पणखा व बिभीषण यांचा जन्म : तदनंतरें जन्मला कुंभकर्ण । जयाच्या बळा न करवे वर्णन । आणिक दृष्टांत नाहीं जाण । पुढे ऐसा न होईल पैं ॥४२॥ तयाउपरी एक कुमरी । जन्मली शूर्पणखा विक्राळ भारी । जियेच्या मुखाची वर्णूं थोरी । तरी तें प्रथमचि भयानक ॥४३॥ तदनंतरें एक पुत्र । धर्मपरायण अति पवित्र । सर्वां भूतीं हितरत । नाम तयाचें बिभीषण ॥४४॥ तयाउपरी ते कैकसी । तिघे पुत्र एक कन्येसी । बसवोनियां वनवासीं । वाढविती झाली पुत्रांप्रति ॥४५॥ ज्येष्ठ पुत्र रावण । अत्यंत क्रूर कपटी जाण । दुसरा तो कुंभकर्ण । त्रैलोक्यी पीडन करिता झाला ॥४६॥ याचेनि भये ऋषी । लपताति दशदिशीं । मारूनि तो ब्राह्मणांसी । भक्षि विचरे वनामध्यें ॥४७॥ बिभीषण धर्मात्मा जाण । करिता झाला वेदपठण । इंद्रियनेमस्त सज्ञान । पुण्यपावन तो झाला ॥४८॥ कोणे एके काळीं धनेश[1] । विचरत आला सावकाश । पितया पहावया उद्देश । तया काळीं तो आला ॥४९॥ आरूढोनि पुष्पकावरी । कुबेर येत तया अवसरीं । चालिला जैसा वज्रधारी । चित्रवनीं क्रीडेतें ॥५०॥

कुबेराच्या ऐश्वर्याचे वर्णन कैकसी रावणाजवळ करिते : तया देखोनि कैकसी । झाली अत्यंत उल्लासी । मग म्हणे रावणासी । हा बंधु कुबेर तुझा ॥५१॥ ऐक गा ये दशग्रीवा । काय सांगूं याच्या वैभवा । वंशीं पुत्र ऐसा व्हावा । भाग्यें ऐश्वर्येंकरोनी ॥५२॥ एक वंशी पुत्र होती । ते पूर्वजांतें तारिती । ऐक लेंक म्हणविती । अध:पाता नेती पूर्वजां ॥५३॥

तसे ऐश्वर्य संपादण्याची रावणाची प्रतिज्ञा : ऐकोनि मातेचें वचन । हृदयीं खोचला रावण । म्हणे माते मी आपण । कीर्ति करीन अगणित ॥५४॥ वैश्रवणाहूनि[2] विशेषेंसीं । ऐश्वर्य भोगीन स्वबळेंसीं । तरीच जन्मलों तुझियें कुसीं । संशय मानसीं धरूं नको ॥५५॥ आपुलेनि जाण वैभवें । स्वर्गींचे देव लावीन सेवे । यदर्थी सत्य मानावें । मनीं न म्हणावें हे मिथ्या ॥५६॥ कुबेरासारिखें तत्काळ । भोगीन संपत्तीचें फळ । हें माझें वाक्य अचळ । अढळ जाण केवळ जननीये ॥५७॥

रावण कुंभकर्ण यांचे गोकर्ण आश्रमास आगमन : ऐसें वदोनि मातेप्रती । दोघे निघाले शीघ्रगती । गोकर्णनाम आश्रमस्थिती । तया स्थळाप्रती पैं आले ॥५८॥ गोकर्णनामें आश्रम । परम पवित्र विश्राम । जेथें सिद्ध योगीश्वर मनोरम । चारण जेथें वसती ॥५९॥ दोघे बंधु समवेत । तेथें स्वस्थ करोनि चित्त । करिते झाले तो कार्यार्थ । सावचित्त अवधारा ॥६०॥ इति श्रीवाल्मीककृत । रामायण उत्तम ग्रंथ । तें हें उत्तरकांडकथामृत । सज्जन संत रिझोत ॥६१॥ श्रीरामकथेचा महिमा । जाणे ज्याची स्त्री उमा । एका जनार्दना एकनामा । भिन्न भाव मुळींच नाहीं ॥६२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणकुंभकर्णशूर्पणखाबिभीषणउत्पत्तिर्नाम नवमोऽध्याय: ॥९॥ ओंव्या ॥६२॥ श्लोक ॥३॥ एवं ॥६५॥

---

शब्दार्थ - १. कुबेर, २. कुबेराहून.

# अध्याय दहावा

॥ श्रीगजाननाय नमः ॥

## रावणाला ब्रह्मदेवाचे वरदान

**श्रीरामांचा प्रश्न :** तदनंतरें अयोध्यापती । ऐकोनि रावणकुंभकर्णउत्पत्ती । अत्यंत सुखावोनि चित्तीं । मुनीप्रती पुसता झाला ॥१॥ ऐकें स्वामी अगस्तिमुनी । तुवां समुद्र प्राशिला आचमनीं । दंडकारण्य वसे तुझेनी । विंध्याद्रि धरणी निजविला ॥२॥ वातापी इल्वल महाराक्षस । मारोनि ऋषी केलें संतोष । ऐसे तुझे उपकार बहुवस । तूं महापुरुष ईश्वररू ॥३॥ कृपा करोनि मज दीनावरी । कथा सांगावी पुढारीं । गोकर्णाश्रमीं रावण घटश्रोत्री[1] । काय करिते पैं झाले ॥४॥ कोण तप तयांचे फळलें । काय नेम करिते झाले । कोण व्रत आचरले । कैसेनि पावले ऐश्वर्या ॥५॥ आधींच कथा रामायण । त्यावरी तुमच्या मुखें निरूपण । आजि श्रवणाचें भाग्य गहन । थणीवरी पान करीन मी ॥६॥ विबुधजितजनकारीचें[2] वचन । ऐकोनि अगस्ति संतोषोन । वाक्पुष्पमाळा गुंफोन । रामार्पण करिता झाला ॥७॥

**रामप्राप्तीसाठी साधना करणाऱ्यांचे प्रकार :** श्रीराघवा तूं अवधारीं । जयालागीं गिरिकंदरीं वसते झाले जटाशिरी । फळाहारी होवोनियां ॥८॥ एक झाले बोडके । ढुंगी लावोनि फडकें । तीर्थें हिंडती अनेकें । भिक्षान्नें खावोनियां ॥९॥ एक मुखीं लावोनि कोळसा । वेष घेती अनारिसा[3] । एक नग्न पिशाचदशा । हिंडती पुरीं पाटणीं ॥१०॥ एकीं आश्रम त्यागोन । सेविलेंसे महावन । एक पंचाग्नि धूम्रपान । जळशयन एक करिती ॥११॥ एक कान फाडोनि मुद्रा ल्याले । आलेख म्हणोनि हिंडो लागले । लक्ष नेणती चुकले । भिके लाविले प्रारब्धें ॥१२॥ एक मस्तक लुंचिती[4] । चालतां क्षिती झाडिती । झाडावरी बैसोनि देहकर्म करिती । देहातें देव म्हणोनी ॥१३॥ ऐसीं अनेक मतांतरें । धुंडाळिते झाले नर । परंतु न कळेचि तुझा पार । न पावती ते कदाकाळें ॥१४॥ तरी अवधारीं राजेंद्रा । इंद्राच्या आदिइंद्रा । क्षयो आहे इंद्रचंद्रां । तूं नरेंद्रा अक्षयी ॥१५॥ तो तूं धरणिजेचा पती । अवतरलासि नानाव्यक्ती । ऐसा तूं आम्हां मूढाप्रतीं । नाना कथा पुसतोसी ॥१६॥ तिघे बंधु गोकर्णाप्रती । येवोनि काय करिते झाले स्थिती । ते कथा अवधारिजे श्रोतीं । सावधान चित्तीं होवोनी ॥१७॥

**कुंभकर्णाची घोर तपश्चर्या :** कुंभकर्ण नित्य नेमस्त । अल्पआहार एकाग्रचित्त । इंद्रियां दमूनि वैराग्ययुक्त । परियेसा तप करीतसे ॥१८॥ उष्णकाळीं पंचाग्नि जाण । वर्षाकाळीं मस्तकीं घे पर्जन्य । शीतकाळीं जळआश्रयण । तप दारुण करीतसे ॥१९॥ बाणांवरी घालोनि आसन । तप करीतसे दारुण । ऐसीं दहा सहस्र वर्षें क्रमण । केलीं जाण श्रीरामा ॥२०॥

**बिभीषणाची उत्कट तपस्या :** स्वधर्मकर्मीं रत । सर्व भूतीं दया शुचिष्मंत । ऐसा बिभीषण पुण्य पवित्र । धर्मपरायण परोपकारी ॥२१॥ परोपकाराएवढें तप । नाहीं श्रीरामा निश्चित । जे परावियातें पीडा करित । पाप अद्‌भुत अंत नाहीं ॥२२॥ ऐसा बिभीषण पुण्यमूर्ती । पाच सहस्र वर्षे तपःस्थिती । एका पायावरी निगुतीं । श्रीरघुपति क्रमियेलें ॥२३॥ तप देखोनि दारुण । स्वर्गी देवां भयाचें भान । तेथें अप्सरा येवोन । नृत्य करित्या पैं झाल्या ॥२४॥ बिभीषणाची तपःस्थिती । देखोनि देव पुष्पें वर्षती । तदनंतरें सूर्यउपस्थिती[5] । करी सुमति

---

शब्दार्थ – १. कुंभकर्ण, २. इंद्रजितपिता रावण त्याचा शत्रू राम, त्याचे, ३. विचित्र, ४. केस उपटिती, ५. सूर्याची उपासना.

राक्षस ॥२५॥ उर्ध्वशिर ऊर्ध्वकर । नयन ऊर्ध्व अवलोकी भास्कर । मुखें सूर्यसुक्त जपे वीर । ऐसीं पांच सहस्र वर्षे क्रमलीं ॥२६॥ एवं दहा सहस्रवरी । बिभीषणतपाची अगाध थोरी । तदनंतरें श्रीरामा तुझा वैरी । त्याच्या तपाची थोरी तूं ऐकें ॥२७॥

रावणाच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन ब्रह्मदेव प्रगटला : दहा सहस्र वर्षेंपर्यंत । निराहारी तप करित । एक सहस्र वर्षे होतां तेथ । अग्नींत होमित शिर एक ॥२८॥ ऐसीं नव सहस्र वर्षे क्रमिलीं । नव शिरें अग्नींत हविलीं । एक शिर उरलें मौळीं । दहावें सहस्र पवर्तलें ॥२९॥ तेंही शिर छेदीन । वैश्वानर तृप्त करीन । ऐसें विवंची[1] रावण । तंव चतुरानन तेथें आला ॥३०॥ इंद्रादि देवांसहित । पितामह आला तेथ । म्हणे रावणा तुझें तप अद्‌भुत । मज संतोष पैं झाला ॥३१॥ तुझिया तपाची थोरी । न वर्णवे वाचेकरीं । तुज प्रसन्न झालों झडकरी । माग इच्छा तें देईन ॥३२॥ पितामहाचें ऐकोनि वचन । दोन्ही कर जोडोनि रावण । करिता झाला साष्टांग नमन । मधुर वचन बोलिला ॥३३॥

भगवन्प्राणिनां नित्यं नान्यत्र मरणाद्भयम् । नास्ति मृत्युसमः शत्रुरमरत्वमहं वृणे ॥१॥

सुपर्णयक्षनागानां दैत्यदानवरक्षसाम् । अवध्योऽहं प्रजाध्यक्षो देवतानां च शाश्वतम् ॥२॥

तृणभूता हि ते मन्ये प्राणिनो मानुषादयः ॥३॥

रावणाची अमरत्वाची मागणी : रावण म्हणे गा प्रजापती । तुम्हांप्रति करितों विनंती । मरणभयाहूनि निश्चतीं । प्राणिया भय असेना ॥३४॥ मृत्यूसारिखा दुसरा वैरी । आन नाहीं ये संसारीं । मृत्यु प्राणियां संहारी । मृत्यूनें केलें देवाचें न चले ॥३५॥ बाल्य तारुण्य वयसा[2] । मृत्यु करी आयुष्यऱ्हासा । जनातें बांधी मरणफांसा । मृत्यूचा सहसा न कळे महिमा ॥३६॥ जरी प्रसन्न झालेति देवा । अमरत्व मज वर द्यावा । सुपर्ण[3] नाग दैत्य दानवा । यांचेनि मृत्यु मज न हो ॥३७॥ निशाचरांचेनि हातें । मज मरण न यावें निश्चितें । आणिकें देवदैवतें । तींही मातें न मारोत जी ॥३८॥ देवांचेनि हातेंकरीं । माझा मृत्यु न व्हावा अवधारीं । मनुष्य मज तृणासरी । गणना न करीं तयांची ॥३९॥ मानवें तृणासमान । तीं माझे दृष्टीसी मशकें दीन । तयांचें भय नाहीं जाण । अमर आपण मज कीजे ॥४०॥ मनुष्यादिकरोनि भूतें । नाणीं मी दृष्टीस त्यातें । त्या मनुष्यांची चिंता नाहीं मातें । जाण निश्चितें प्रजापति ॥४१॥ जरी प्रसन्न झालासी मजवरी । अमर होई ऐसी कृपा करीं । ब्रह्मा म्हणे होईल निर्धारीं । चिंतिलें पावशील रावणा ॥४२॥

ब्रह्मदेवाने रावणाला अमरत्व देऊन त्याची सर्व शिरे त्याला दिली : इतुकियांचे हातें तत्वतां । मरण तुज नव्हे लंकानाथा । सत्य मानीं मम वाक्यार्था । अमर तत्वतां तुज केलें ॥४३॥ अगस्ति म्हणे श्रीरघुनाथा । प्रजापतीनें विंदाण करूनि तत्वतां । वर दिधला लंकानाथा । भविष्यता जाणोनि ॥४४॥ पुनरपि बोले प्रजापती । ऐक ये गा लंकापती । तुवां शिरें हविलीं अग्नीप्रती । ती मागुतीं तुज दिधलीं ॥४५॥ पूर्विल्यापरी राक्षसास । सुंदरता बाणली बहुवस । तदनंतर बिभीषणास । बोलता झाला चतुरानन ॥४६॥ बिभीषणा तूं धन्य सुमती । बिभीषणा तुझी अगाध कीर्ती । बिभीषणा तुझी शुद्ध तपःस्थिती । अत्यंत चित्तीं सुखावलों ॥४७॥ बिभीषण तुझें निष्काम तप । बिभीषणा तुझा धन्य जप । बिभीषणा तूं निर्विकल्प । सुख अमूप मज झालें ॥४८॥

---

शब्दार्थ - १. विचार करी, २. म्हातारपण, ३. गरुड.

बिभीषणाला वरप्रदानाची इच्छा : जो वर मागसी ये समयीं । तो मी देईन जाण निश्चयीं । बिभीषणें मस्तक ठेविला पायीं । काय तें समयीं बोलत ॥४९॥ सकळ गुणीं संपन्न । ऐसा बिभीषण धर्मज्ञ । मृदु मंजुळ वाचेकरून । चतुरानन प्रार्थिला ॥५०॥ प्रजाध्यक्ष प्रजापती । सकळ देव तुज आश्रयिती । परी एक माझी विनंती । सावित्रीपति[1] ऐकिजे ॥५१॥ आजि आपण धन्य धन्य । आजि फळलें सकळ पुण्य । जो त्रैलोक्यगुरु चतुरानन । स्वयें आपण वर देतो ॥५२॥ संतोषोनि प्रजापती । जरी वर देतोसि मजप्रती । तरी मागणें सुनिश्चितीं । सावधानवृत्ती अवधारीं ॥५३॥

बिभीषणाचे मागणे : मज राज्याची चाड नाहीं । ऐश्वर्य मज न लगे पाहीं । मज साधुसमागम देईं । आणिक नाहीं मज इच्छा ॥५४॥ अखंड माझी चित्तवृत्ती । लागो संतांचे संगतीं । आणीक मजला भगवद्भक्ती । कृपामूर्ति देईजे ॥५५॥ जेणें होय परमपद प्राप्त । ऐसें ज्ञान दीजे निश्चित । यावेगळे नश्वर पदार्थ । स्वामी निश्चित मज नलगती ॥५६॥ बिभीषणाचें ऐकोनि बोलणें । विरंचि आनंदला मनें । म्हणे वत्सा धन्य मागणें । अवश्य जाण तुज दिधलें ॥५७॥ बिभीषण म्हणे स्वामिनाथा। ज्या ज्या आश्रमीं मज वर्ततां । तेथें तेथें बुद्धि सर्वथा। धर्मपंथा पैं लागो ॥५८॥ गुरूवेगळी ब्रह्मप्राप्ती । होय ऐसी कृपा करीं निश्चितीं । माझा गुरू तूचिं प्रजापती। मी मंदमति अज्ञान ॥५९॥ परम उदारा चतुरानना । माझी बुद्धी सद्वासना । लागो श्रीहरीच्या भजना । आणिक मना नावडे ॥६०॥ पुनरपि तो प्रजापती । ऐकोनि बिभीषणवचनोक्ती । आनंदें वोसंडला चित्तीं। काय मागुतीं बोलत ॥६१॥

त्याला वरदान : अगा ये वत्सा अवधारीं । जें चिंतिसील मनामाझारीं । ते तें पावसील मद्वरदेंकरीं । जाण निर्धारीं मद्वाक्यें ॥६२॥ अमरत्व तूं पावसी । वैरियांतें त्रास देसी । स्वधर्मकर्मी रत होसी । प्रतिपाळिसी आश्रमधर्म ॥६३॥ तदनंतरें चतुरानन । मिळोनि समस्त देवगण । जेथें होता कुंभकर्ण । तेथें आले समस्तही ॥६४॥

कुंभकर्णाला वर देऊ नये म्हणून देवांची ब्रह्मदेवाला प्रार्थना : प्रजापती कुंभकर्णालागून । वर देतोसे जाणोन । सकळ सुरवर कर जोडोन । प्रार्थूं लागले ब्रह्मयासी ॥६५॥ अगा चतुर्वक्त्रा अष्टनेत्रा । विचारिजे पात्रापात्रा । तूं तरी सकळांचा अधिष्ठात्रा[2] । भूत[3] भविष्या जाणसी ॥६६॥ हा राक्षस दृष्ट दुर्मती । वर न द्यावा ययाप्रती । येणें भक्षिले प्राणी नेणों किती । ऋषींसहित असंख्य ॥६७॥ येणें तपोधन भक्षिले । येणें देवांस त्रास दिधले । याचेनि देश उद्वस झाले । मार्ग खुंटले मार्गस्थांचे ॥६८॥ हा अधर्मी महापातकी । यातें वर न द्यावा हे बुद्धि निकी[4] । प्रलोभावा माव[5] करूनि निकी । जेणें विघ्न टळे त्रैलोक्याचें ॥६९॥ ऐकोनि देवांची विनवण । चिंतातुर चतुरानन । कांही बुद्धि न चले जाण । तंव सरस्वती आपण तेथें आली ॥७०॥

सरस्वती कुंभकर्णाच्या जिव्हेवर विराजिली : तंव जोडोनि कर ब्रह्मतनया[6] । बोले स्वामी अहो विधातया । तुम्हीं कोण चिंता कवण कार्या । ते मजप्रती सांगितजे ॥७१॥ तुमची मी आज्ञाधारी । जें सांगाल तें वंदीन शिरीं । तंव बोले विधाता ते अवसरीं । अवो सारजे[7] परियेसीं ॥७२॥ कुंभकर्णाचे जिव्हेवरी । तुवां बैसावें कुमारी । देवांचे मनोरथ पूर्ण करीं । जिव्हा धरीं तयाची ॥७३॥ विरंचीचें शब्दरत्न । शिरीं धरोनि सरस्वती आपण । राक्षसजिव्हाग्रीं प्रवेशोन । पुढील कथन अवधारा ॥७४॥ ब्रह्मा म्हणे पुलस्त्यकुमारा । महाबाहो महाशूरा । वर देतो माग चतुरा । कां शरीरा पीडितोसी ॥७५॥

---

शब्दार्थ - १. ब्रह्मदेवा, २. अधिपती, ३. झालेले, ४. चांगली, ५. कपट, ६. सरस्वती, ७. हे सरस्वती.

**कुंभकर्णाने निद्रेची मागणी केली :** ब्रह्मयाचें ऐकोनि वचन । संतोषला कुंभकर्ण । अनेक वर्षे निद्रा दारुण । कृपा करोन मज दीजे ॥७६॥ भविष्यस्थितीं वचनें येणें । चतुरानन बोलिला हासोनि मनें । सुरवर आनंदले तेणें । तपोधन संतोषले ॥७७॥ राक्षसमुखांतून सरस्वती । गेली आपुल्या आश्रमाप्रती । पुढें देवांसह प्रजापती । गगनोदरीं प्रवेशले ॥७८॥

**निद्रा मागितली याबद्दल कुंभकर्णाला पश्चाताप :** तदनंतरें कुंभकर्ण । मनामाजी करी विचारण । प्रसन्न झाला चतुरानन । काय म्यां आपण मागीतलें ॥७९॥ दीर्घ निद्रा मागितली। मज ते समयीं भुली पडली । किंवा देवीं मोहिनी प्रेरिली । काय झाली गति न कळे ॥८०॥ वृथा तप मज झालें । माझे कष्ट वायां गेले । माझें पूर्वकर्म फळासी आलें । तेणें झालें विपरीत हें ॥८१॥ माझिये बुद्धीस भ्रंश झाला । मज विधाता ठकोनि गेला । बोल आपुल्या कपाळाला । थोर तळमळा पैं देत ॥८२॥ एवं बंधु तिघे जण । वरद पावोनि संपूर्ण । तीन्ही त्रेताग्नीसमान । श्लेष्मांतकवना जाते झाले ॥८३॥ श्लेष्मांतकवना कैसें । जेथे भोकरीं बहुवसें । फळीं फुलीं क्रीडती वायसें[१]। तया प्रदेशीं राहते झाले ॥८४॥ एका जनार्दना शरण । तया वनीं रावण कुंभकर्ण । बिभीषणासमवेत जाण । सुखसंपन्न क्रीडते झाले ॥८५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणादिवरप्रदानं नाम दशमोऽध्यायः ॥१०॥ ओंव्या ॥८५॥ श्लोक ॥३॥ एवं ॥८८॥

## अध्याय अकरावा

॥ श्रीराम प्रसन्न ॥

### रावणाला लंकेची प्राप्ती

**सुमाळी व इतर प्रमुख राक्षसांची रावणाला प्रार्थना :** पूर्वप्रसंगीं श्रीरघुपती । रावणासी झाली वरदोक्ती । तें जाणोनि सुमाळी निश्चितीं । अभय चित्तीं समाधान ॥१॥ उठोनि समस्त रजनीचर[२]। मारीच प्रहस्त विरूपाक्ष महोदर । आणिक प्रधान थोर थोर । येते झाले समस्तही ॥२॥ सुमाळी समस्त राक्षसेंसीं । येता झाला रावणापासीं । काय बोलिला तयासी । सावधानेंसीं अवधारा ॥३॥ अगा दशग्रीवा महावीरा । तपोबळेंकरूनि चतुरा । पावलासी चिंतिल्या प्रकारा । परमोदारा रावणा ॥४॥ तूं त्रिभुवनीं श्रेष्ठ राक्षस । पावलासी उत्तम वरास । विष्णुभयें पावलों त्रास । लंका त्यजूनि रसातळा गेलों ॥५॥ महाबाहो तेथें गेलों । तेथें असतां विष्णुभय पावलों । थोर संग्रामीं भग्न झालों । सांडवलों आश्रमापासूनी ॥६॥ सुहृद सोयरे समवेत । प्रवेशलों रसातळांत । तुज झालें वरद प्राप्त । म्हणोनि आम्ही धांवत येथें आलों ॥७॥ आम्हांसी वसावया जाण । धनेशें[३] दिधलें लंकाभवन । कुबर तुझा ज्येष्ठ बंधु त्यानें । लंकापुरी वसविली ॥८॥ आतां याहीउपरी । वैरियें नेलें तें झडकरी । येईल जाण निर्धारीं । सामें दामें भेदें युद्धें ॥९॥ परावें[४]जें हरियलें । तें पावों संग्रामबळें । अथवा करोनि नानाछळें । वैरी नेलें तें आणवूं ॥१०॥ ऐक रावणा याहीवरी । तूं लंकेचें राज्य करीं । तूं लंकेश्वर निर्धारीं । काया वाचा मानसें ॥११॥ सर्व राक्षसांच्या ईशा । होईं गा तूं महापुरुषा । हे सत्य मानोनि लंकेशा । लंकाराज्य तूं करीं ॥१२॥

---

शब्दार्थ - १. कावळे, २. राक्षस, ३. कुबेराने, ४. शत्रूने.

**रावणाचा नकार :** रावण म्हणे सुमाळीसी । धनेश[1] ज्येष्ठ बंधु आम्हांसी । आपण तयावांचोनि राज्यासी । अंगीकारासी न करावें ॥१३॥ जाणोनि रावणाच्या वचनासी । सुमाळी राहिला तटस्थेंसीं । तदनंतरें श्रीरामा परियेसीं[2] । सावधान होवोनियां ॥१४॥

**देव-दैत्यांच्या वैराचा इतिहास प्रहस्त प्रधान रावणाला सांगतो :** कोणे एके काळीं रावण । राक्षसासमवेत जाण । बैसला असतां विराजमान । प्रहस्त प्रधान बोलता झाला ॥१५॥ महाबाहो परियेसीं कथेसी । देवदैत्य असुरांसी । वैर पूर्वीपासोनि तयांसी । गोत्रसंबंधासी राजेंद्रा ॥१६॥ तरी बंधु कैसे म्हणसी । येविशीं ऐक इतिहासासी । पूर्वी एक कश्यपऋषी । तेरा स्त्रिया त्यासी असती ॥१८॥

अदितिश्च दितिश्चैव भगिन्यौ सहिते उभे । भार्ये परमरूपिण्यौ कश्यपस्य प्रजापतेः ॥१॥
अदितिर्जनयामास देवास्त्रिभुवनेश्वर । दितिस्त्वजनयद्दैत्यान्कश्यपस्यात्मसम्भवान् ॥२॥
दैत्यानां किल धर्मज्ञ पुरीयं बत सार्णवा । सपर्वता महावीर तेऽभवन्प्रभविष्णवः ॥३॥
निहत्य तांस्तु समरे विष्णूना प्रभविष्णुना । देवानां वशमानीतं त्रैलोक्यमिदमव्ययम् ॥४॥

**लंकेचा इतिहास ऐकून रावण उद्विग्न :** अदिती दिती दोघी बहिणी । रूपें तरी चंद्राननी । तयांच्या स्वरूपा अप्सरा लाजोनी । स्वर्गांगना होत्या झाल्या ॥१९॥ कश्यपऋषितपेंकरीं । दक्षप्रजापतीच्या त्या कुमरी । तया घरीं सुंदरी । भर्तृसेवा करीत होत्या ॥१९॥ अदिती देवांसि जन्मविती । जे त्रिभुवनीं नांदती । दितिउदरीं दैत्य जन्मती । कश्यपसंतती उभयतां ॥२०॥ दैत्यांकारणें श्रीरामा । पर्वताग्री विश्वकर्मा । लंका निर्माण करवी व्योमा[3]-समान जीचें उच्चत्व ॥२१॥ भोंवता अंबुनिधिपरिघ[4] पूर्ण । लंका सुवर्णाची तेजें गगन । लखलखीत दशदिशा जाण । पताका तोरणें सुवर्णाचीं ॥२२॥ ते राक्षसांची लंकापुरी । विष्णु समरांगणीं राक्षसमारीं । हरोनि तो दैत्यारी । देवां वश करिता झाला ॥२३॥ देवीं त्रैलोक्य वश केलें । राक्षसाते पराभविलें । म्हणोनि आम्हीं पाताळें । विष्णुभयें वसविलीं ॥२४॥ असो ऐसें पूर्वील कथन । देवां दैत्या वैर दारुण । देवीं विपरीत करोन । त्रैलोक्यीं वसते झाले ॥२५॥ ऐकोनि प्रहस्ताचें वचन । रावणें अंतर्दृष्टि लावोन । मुहूर्त[5] एक चिंता करून । थोर उद्विग्न पैं झाला ॥२६॥ स्वस्थ न वाटे तयाचे चित्तीं । नावडे वैभव संपत्ती । मुखें कोमलीं मनोवृत्ती । चंचळ झाली तयाची ॥२७॥ समस्त राक्षस मिळोन । वनीं विचरतां रावण । लंकेप्रती पाठवावया गण । प्रहस्त प्रधान बोलाविला ॥२८॥

**लंकाधीश कुबेराकडे लंकेची मागणी करण्यासाठी प्रहस्ताला रावणाने पाठविले :** अगा प्रहस्ता गुणनिधी । तूं बुद्धिवंत जैसा क्षीराब्धी । धैर्याचा मेरु त्रिशुद्धी[6]। मज एक बुद्धी आठवली ॥२९॥ तुवां शीघ्र त्रिकूटाचळासीं । जावोनि तया कुबेरापाशीं । भेटावें माझिये वाक्येसीं । तयापासीं सांगावें ॥३०॥ माझें जे कां शब्दरत्न । तयासी करावें निवेदन। सामोपचारेंकरोन । वित्तेश[7] आपण बोधावा ॥३१॥ म्हणावें हें लंकापुरी । तुवां वसविली राक्षस वसावया खरी। तुझिया प्रतापाची थोरी। सुरासुरीं वर्णिजे ॥३२॥ तुवां हें लंकाभवन। मज द्यावें प्रीती करून। तूं ज्येष्ठ बंधु पितयासमान। माझें वचन मानावें ॥३३॥ मग तो प्रहस्त झडकरी । प्रवेशला जेथें वित्तेश राज्य करी । तें लंकची वर्णूं थोरी । तरी अमरपुरीं तुकीं न ये ॥३४॥ ऐसिये लंकेप्रती जाण । धनेश राज्य करी सुखसंपन्न । प्रहस्त रावणप्रधान । येता झाला ते समयीं ॥३५॥

---

शब्दार्थ – १. कुबेर, २. ऐक, ३. आकाशासीं, ४. समुद्राचा वेढा, ५. दोन घटिका, ६. खरोखर, ७. कुबेर.

प्रहस्ताची कुबेराकडे लंकेची मागणी : करोनि कुबेरासी नमस्कार । काय बोले प्रहस्त चतुर । स्वामी एक विनंती आदर । करोनि आयकिजे ॥३६॥ तुमचा कनिष्ठ बंधु रावण । त्यानें मज पाठविलें जाण । तुम्हांपासीं एक वचन । विज्ञापन करूं आलों ॥३७॥ शस्त्रधरांमध्ये परम श्रेष्ठा । परमउदारा परमनिष्ठा । दशग्रीवा[1] एक उत्कंठा । म्हणोनि मजला पाठविलें ॥३८॥ धनेशा हे लंकापुरी । रम्य इजसमान नाहीं दुसरी । सुमाळिप्रमुख निशाचरीं । पूर्वी येथें पराक्रमें बसविली ॥३९॥ हें लंकापुरीभवन । पूर्वीं राक्षसीं भोगिलें जाण । हें नगर राक्षसांलागोन । द्यावें तुम्हीं वैश्रवणा[2] ॥४०॥ तरी मी करितों विनंती । लंका देईं रावणाप्रती । तरी वाढेल यश कीर्ती । जे बंधुवचन मानितां ॥४१॥ ऐकोनि प्रहस्ताचें वचन । मग काय उत्तर देता झाला वैश्रवण । मज हे लंका विश्रवा[2] पित्यानें । शून्य होती म्हणोन दिधली ॥४२॥ राक्षसीं त्यजिली लंका । विष्णुभयें गेले पाताळलोका । ते म्यां वसविली आयका । दानमानगुणेंकरोनी ॥४३॥

कुबेराने तत्काळ लंका रावणाला दिली : आतां प्रहस्ता झडकरीं । तू जावोनि रावणा आज्ञा करीं । जे हे लंका महानगरी । येथें राज्य करीं निष्कंटक ॥४४॥ तुज हे लंकाभवन । पितयानें दिधलें जाण । मज दिधलें वित्तरक्षण । तें आपण मी रक्षितों ॥४५॥ ऐसें बोलोनि वैश्रवण । पुष्पकारूढ होऊन । जेथें होता पिता विश्रवा जाण । तेथें आला कुबेर ॥४६॥

कुबेराचे आपल्या पित्याला वृत्तनिवेदन : दोन्ही कर जोडोन । पित्यासि करी साष्टांग नमन । बोले मृदु मंजुळ वचन । सावधान ऐकें श्रीरामा ॥४७॥ अगा ये ताता परिसेयीं । रावणें लंका मागावयासी । पाठविलें प्रहस्त प्रधानासी । मजपासीं शिष्टाई ॥४८॥ म्यां ऐकोनि प्रहस्तवचन । रावणा दिधलें लंकाभवन । पूर्वी राक्षस होते म्हणोन । आतांही राक्षस वसतील ॥४९॥ मजकारणें स्वामिनाथा । अनुच्छिष्ट[3] नगर देईं आतां । ऐकोनियां पुत्रकथा । काय झाला बोलता विश्रवा ॥५०॥

पित्याने कुबेराला कैलासपर्वतावर रहाण्यास सांगितले : हात जोडोन पुत्राप्रती । विश्रवा करी विनंती । माझें वचन सावधवृत्ती । ऐकें बा रे कुबेरा ॥५१॥ मजसन्निध येऊन । दशग्रीव बोले छळवचन । मज अत्यंत निर्भर्त्सून । दुर्मति पुनःपुनः क्रोधें बोले ॥५२॥ तरी कुबेरा मी तुजप्रती । बोलतों स्वधर्माची युक्तीं । जेणें होय यश कीर्ती । स्वर्गी वानिती सुरसिद्ध ॥५३॥ वरप्रदानेंकरून । रावण नेणे मानापमान । त्याहीवरी शाप दारुण । मूढ प्रकृती झाली ॥५४॥

तस्माद्गच्छ महाबाहो कैलासधरणीधरम् । निवेशय निवेशार्थं त्यक्त्वा लंकां सहानुगाम् ॥५॥
तत्र मंदाकिनी रम्या नदीनामुत्तमा नदी । कांचनैः सूर्यसंकाशैः पंकजैः संवृतोदका ॥६॥
कुमुदैरुत्पलैश्चैव अनेकैश्च सुगंधिभिः । तत्र देवाः सगंधर्वाश्चाप्सरोरगकिन्नराः ॥७॥

विश्रवा म्हणे महाबाहो झडकरीं । कुबेरा जाई जेथें कैलासगिरी । धरणीतें धरिलें ज्याची थोरी । त्या पर्वतावरी जाईं वेगीं ॥५५॥ समस्त सुहृदांसहित । तुवां वसावें तेथ । लंका त्यजूनियां त्वरित । सुखें स्वस्थ रहावें पुत्रा ॥५६॥ कैलासगिरीचे पाठारीं । मंदाकिनीचे तीरीं । तुवां वसवावी नगरी । सपरिवारीं रहावें तेथें ॥५७॥

मंदाकिनी नदीचे माहात्म्य : तरी तें मंदाकिनीचें वर्णन । करावें ऐसी मति नाहीं जाण । जिचें होतांचि स्मरण । पाप दारुण धाकें पळे ॥५८॥ जे मंदाकिनी देखती दृष्टीं । तयां नरांची

शब्दार्थ - १. रावणाला, २. कुबेरा, ३. दुसऱ्याने न भोगिलेले.

पातकें गिरिकपार्टी । लंघिताही सकळ सृष्टी । बसावया ठाप पैं नाहीं ॥५९॥ धन्य मंदाकिनीचें जीवन । जे नर करिती स्नान आचमन । तयांचे पुण्याचे गणन । सर्वथा जाण न करवे ॥६०॥ मंदाकिनीस जे करिती स्नान । तयां कोण गति हें शास्त्रां मौन । न बोलवे वेदांसि जाण । तेथें आपण काय जाणों ॥६१॥ मंदाकिनी स्वर्गभूषण । मंदाकिनीसी विष्णुचरणीं जनन । मंदाकिनी महेशें जाण । मस्तकीं भूषण म्हणोन धरियेली ॥६२॥ तिये मंदाकिनीचे तीरीं । जो स्नान दान तर्पण करी । तयाचे पूर्वज अंबरीं । सुखरूप होवोनि राहती ॥६३॥ तें मंदाकिनी अति पावन । कांठीं सुवर्णकमळें विकासमान । सूर्यतेजासम जाण । कुमुदें उत्फुल्ल[1] साजिरीं ॥६४॥ अनेक सुगंधीं पुष्पजाती । कोट्यनुकोटी नेणों किती । देव गंधर्व क्रीडा करिती । उरगकिन्नरादिकरोनी[2] ॥६५॥ क्रीडा करिती संतत । राहोनि त्या तटाकांत । आनंदें निर्भर मनांत । आश्रयोनि तेथ असती ॥६६॥ आयकें कुबेरा अवधारीं । तुम्हीं जाणतां चराचरीं । राक्षस निष्ठुर भारी । लाधले उत्तम वरातें ॥६७॥ त्याहूनि कोण आहे श्रेष्ठ । जे तप करोनि उत्कृष्ट । तरी तूं जाणता धर्मिष्ठ । माझें वचन करावें ॥६८॥ ऐसें विश्रवा बोलतां । कुबेर चित्तीं उल्लासता । पितृवचन गौरवोनि माथां । काय करिता जाहला ॥६९॥

कुबेर सहकुटुंब कैलासाला गेला : स्त्रीपुत्र आणि प्रधान । घेवोनि आपुलें निजसैन्य । निजवाहनीं आरूढोन । जाता झाला कैलासा ॥७०॥ शून्य झाली लंकापुरी । तीस योजनें लांब दूरी । मनुष्य नाहीं तियेभीतरीं । उद्वस दिसे श्रीरामा ॥७१॥ तदनंतरे जावोनि प्रहस्त । रावणाप्रति सांगे वृत्तांत । तुम्ही रावण राक्षसांसहित । राज्यधर्म करा लंकेमध्यें ॥७२॥ ऐसें ऐकोनि प्रहस्तवचन । बंधूसमवेत सेनाप्रधान । प्रवेशोन लंकाभवन । काय रावण करिता झाला ॥७३॥ जैसा स्वर्गी शचीपती । आरूढोनि विमानाप्रती । तैसा उंच लंकापती । वेंघोनि दिशा अवलोकी ॥७४॥

स चाभिषिक्तः क्षणदाचरैस्तदा निवेशयामास पुरीं दशाननः ।
निकामपूर्णां च बभूव सा पुरी । निशाचरैर्नीलबलाहकोपमैः ॥८॥

लंकेत रावणाला राज्याभिषेक : तेव्हां ते समस्त राक्षस । राज्याभिषेक सावकाश । करूनि रावणा राज्याधीश । लंकाभवनीं स्थापिला ॥७५॥ मनःकामना पूर्ण झाली । लंकेसारखी नगरी आली । तेथें राक्षस महाबळी । नानावर्णीचे राहिले ॥७६॥ जैसें आकाशीं अभ्र घन । निबिड दाटे आच्छादे गगन । तैसे राक्षस नीळवर्ण । वसले लंकापुरीं ॥७७॥

कुबेराची अलकानगरी : तदनंतरें श्रीरघुपती । धनेश पितृवाक्यउत्साहस्थितीं । वसते झाले अलकेप्रती । ते अलकेची स्थिती अवधारा ॥७८॥ चंद्रासारिखी शुभ्र निर्मळा । तैसी अलका शोभे गा भूपाळा । सुवर्णअलंकार विचित्रमाळा । मुक्ताफळाचीं तोरणें ॥७९। जैसा इंद्र अमरावतीं । क्रीडता होय निर्भयचित्ती । तैसा कुबेर अलकेप्रती । सुखरूपस्थितीं राहिला ॥८०॥ एका जनार्दना शरण । रावणा प्राप्त लंकाभवन । कुबेर अलकेप्रति जाण । सुखसंपन्न राहिला ॥८१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणलंकाप्राप्तिर्नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ ओंव्या ॥८१॥ श्लोक ॥८॥ एवं ॥८९॥

---

शब्दार्थ - १. चंद्रविकासी कमळे, २. सर्प, गंधर्व वगैरे.

# अध्याय बारावा

॥ श्रीजानकीवल्लभाय नमः ॥

## रावणादिकांचा विवाह व इंद्रजिताचा जन्म

**शूर्पणखा-विद्युज्जिव्ह यांचा विवाह :** तिघां बंधूंसमवेत । दशग्रीवा लंकाराज्य प्राप्त । नांदत असतां सुखस्वस्थ । पुढील कथार्थ अवधारा ॥१॥ तदनंतरें शूर्पणखा भगिनी । देखिली यौवनेंकरोनी । रावणासि चिंता मनीं । हे कोणास पैं द्यावी ॥२॥ ते शूर्पणखा कैसी । सुपासारिखीं नखें जीसी । म्हणोनि शूर्पणखा नांव तियेसी । श्रीरामा ऐसी जाणिजे ॥३॥ दनूपासूनि संभव । यालागीं तो दानव । विद्युज्जिव्ह ऐसें नांव । रावण तया भगिनी देता झाला ॥३॥ जेंवी विद्युल्लता अंबरीं । तैसी जिव्हा मुखाबाहेरी । म्हणोनि विद्युज्जिव्ह नामाधिकारी । महाभयंकर दानव ॥५॥ विधिपूर्वक कन्यादानासीं । शूर्पणखा दिधली त्यासी । दशग्रीव आपण पारधीसी । मृगें मारावयासी हिंडता झाला ॥६॥

**रावणाची आणि मयासुराची भेट :** तिथें दशग्रीव विचरतां । दृष्टी देखिलें दितिसुता । मय ऐसें नाम प्रसिद्धता । सवें दुहिता स्वरूपिणी ॥७॥ कन्येसहित मयासुरासी । विचरतां ते वनप्रदेशीं । दशग्रीव देखोनि तयासी । थोर आश्चर्यासी पावला ॥८॥ म्हणे हें निर्मानुष वन । या वनीं नाहीं मृगपक्षिगण । तूं कोण कोणाचा कोठील किंकारण[1] । सवें कन्यारत्न किमर्थ असे ॥९॥ सांग ते हे मृगनयनी । अत्यंत सुकुमार कन्या कीं भगिनी । हिंडतसां इये वनीं । कोण कार्यालागूनी मज सांगा ॥१०॥ ऐकोन रावणाचें वचन । मय बोलिला आपण । ऐक माझें समूळ कथन । सावधान राक्षसेंद्रा ॥११॥

**मयासुर आपली कन्या मंदोदरी हिची माहिती सांगतो :** हेमानामें अप्सरेतें । ऐकिलें असेल पूर्वी तीतें । ते देवीं दिधली होती मातें । सुखसंभोगाकारणें ॥१२॥ ते हेमा अत्यंत सुंदरी । मी तिसीं क्रीडें विषयेंकरीं । जैसा शचीसीं वृत्रारी[2] । नंदनवनीं क्रीडतसे ॥१३॥ तिसीं मग सक्त होवोन । सहस्र वर्षेपर्यंत जाण । मज ते देवकार्यालागून । दीन करूनि गेली ॥१४॥ तियेकारणें दशग्रीवा जाण । म्यां केलें मायामय हें भवन । सर्व नगर हेमवर्ण । विचित्र रचन पैं केलें ॥१५॥ वज्रवैडूर्यरत्नभित्ती । पाचूबद्ध शोभे क्षिती । अवघी मायामय स्थिती । ते मी किती वर्णूं आता ॥१६॥ हेमेवीण येथे आपण । वसता झालों अति दीन । हेमा होती माझा प्राण । ते सोडोन मज गेली ॥१७॥ आम्ही तिचेनि दुःखेकरीं । दोघे झालों रानभरी । हे कन्या धरोनि करीं । वनाभीतरीं मी आलों ॥१८॥ हे होय माझी कुमारी । हेमेच्या कुशीं जन्मली निर्धारीं । इसी रूपें गुणें वयेंकरी[3] । वरविचारणीं[4] मज चिंता ॥१९॥ कन्येचें पितयासी बहु दुःख । कन्या राखतांही परम क्लेश । उभयतां कुळ पाहिजे चोख । तरीच देख शुद्ध पुण्य ॥२०॥ याहीपूर्वी माझिये घरीं । होती गुणवंती नारी । दोघे पुत्र तियेचे उदरीं । मायावीदुंदुभिनामें जन्मले ॥२१॥ मायावी प्रथम पुत्र जाण । दुसरियाचें दुंदुभि नामकरण । हें प्रथम स्त्रियेचें संतान । हेमेची हे मंदोदरी ॥२२॥

**रावणाने आपली माहिती मयासुराला सांगितली :** ऐसा माझा वृत्तांत । तुजप्रति सांगितला यथोक्त । तूं कोण कोणाचा या वनांत । किंनिमित्त आलासी ॥२३॥ कृपा करोनि मजवरी । आपुला वृत्तांत झडकरी । आम्हांप्रती श्रुत करीं । ऐसें मयासुर बोलिला ॥२४॥ ऐकोनि मयासुराचें वचन । मग तो राक्षसेंद्र आपण । म्हणे मी पौलस्तिनंदन । दशग्रीव जाण नाम

---

शब्दार्थ - १. कोणत्या कारणाने, २. वृत्रनामक दैत्यांचा शत्रू इंद्र, ३. वयाने (योग्य), ४. वर पाहण्यात.

माझें ॥२५॥ वैश्रवणासमवेत । आम्ही चौघे पौलस्तिसुत । आमुचा पूर्वज ब्रह्मा निश्चित । ऐक गा दानवेंद्रा ॥२६॥ अगस्ति म्हणे श्रीरामासी । ऐसें रावण बोलिला दानवेंद्रासी । तेचि कथा मी तुजपासीं । सांगतसे रावणारि ॥२७॥

रावण-मंदोदरीचा विवाह : रावण पौलस्तिनंदन । ऐसें दानवेंद्रें ऐकोन । करीं धरोनि कन्यारत्न । रावणासि देता झाला ॥२८॥ तदनंतर मयासुर रावणासी । बोले माझी कन्या हे परियेसीं । हेमेपासोनि जन्म इसी । मंदोदरी इसी नाम साचें ॥२९॥ प्रतिगृह्यताम्[१] वचनेंकरीं । दान देता झाला कुमारी । येरें पतिगृह्णामि झडकरी । बोलोनि हातीं सुंदरी धरियेली ॥३०॥ प्रीत्यर्थ हे तुजप्रती । शमी देतों गा लंकापती । येरें बहु बरें म्हणोनि चित्तीं । बोलता झाला रावण ॥३१॥ तेथे अग्नि प्रज्वळून । करिता झाला लाजाहवन[२] । सोमसूर्य साक्षी करून । विवाहहोम संपादिला ॥३२॥ तदनंतरें मयासुरासी । ठाऊक नाहीं जे शाप रावणासी । पूर्वी वदला महाऋषी । हें नेणेचि मयासुर ॥३३॥

रावणाला मयासुराकडून दारुण शक्तीचा लाभ : प्रजापतिवंशीं उत्पत्ती । म्हणोनि मंदोदरी रावणाप्रती । आणिक मयनामें शक्ती । देता झाला मयासुर ॥३४॥ ते शक्ति अत्यंत दारुण । भेणें सुरासुर कंपायमान । जे शक्तीनें भेदिला लक्ष्मण । जैं द्रोणाद्रि आणिला हनुमंतें ॥३५॥ या प्रकारें श्रीरघुपती । स्त्रियेसहित लंकापती । राज्य करीत पुढील स्थिती । सावधान श्रोतीं अवधारिजे ॥३६॥ कोणी एके दिवसीं लंकापती । जाता झाला वनाप्रती । भ्रातृलग्नचिंता चित्तीं । तंव दोघी कन्या देखिल्या ॥३७॥

कुंभकर्णाचा वज्रसारेशीं व बिभीषणाचा सरमेशीं विवाह : त्या कन्यांचें आख्यान । सांगतसें श्रीरामा जाण । एक वैरोचकन्येचें कन्यारत्न । वज्रसारा नाम जीचें ॥३८॥ ते भार्या कुंभकर्णासी । रावण करिता झाला समकाळेसीं[३] । दुसरी गंधर्वकन्या सरमानामासीं । ते बिभीषणासी नेमिली ॥३९॥

सरमा नाव का पडले? : तें गंधर्वराजकन्येसी । सरमा नाम झालें काशानसी[४] । सांगावें मुनि मजपासीं । विस्तारेंसी कथेसी त्या ॥४०॥ ऐकोनि राघवाचें वचन । काय बोले अगस्ति आपण । म्हणे श्रीरामा तूं ब्रह्म पूर्ण । आमचा मान वाढविसी ॥४१॥ तरी आइकें जी श्रीरामा । तियेसि नाम कां झाले सरमा । येविषयीं पृच्छा[५] आम्हां । पुससी तूं श्रीरघुवीरा ॥४२॥ तरी मानसनाम सरोवर । माजि कमळिणी मनोहर । तेणें तडाग[६] अति सुंदर । सरमा मातेसहित तेथें होती ॥४३॥ तेथें पर्जन्य वर्षला । तेणें सरोवरासि पूर आला । सरमा भिऊन शब्द केला । माते धांव बुडालें ॥४४॥ ऐकोनि कन्येचें वचन । माता झाली उद्विग्न । सरोवराप्रति दीनवदन । बोलती झाली ते काळीं ॥४५॥ अगा सरोवरा महाजळेसीं । वाढों नको वचन परियेसीं । ऐकतां लागली तटप्रदेशीं । सरमा नाम यास्तव ॥४६॥ सरमा गंधर्वनंदिनी । रूपें तरी मृगनयनी । ते स्त्री बिभीषणालागूनी । करिता झाला रावण ॥४७॥ एवं तिघे बंधु लंकेप्रती । आपुलाले भार्येसीं राज्य करिती । जैसे स्वर्गी गंधर्व क्रीडती । तैसे राहती राक्षस ते ॥४८॥

इंद्रजिताचा जन्म : तयाउपरी मंदोदरीसी । पुत्र झाला मेघनाद नामेंसी । शक्रजित म्हणती ज्यासी । प्रतापें बळें आगळा[७] ॥४९॥ श्रीराम म्हणे अगस्ति मुनी । मेघनाद ऐसें काशानी । म्हणती इंद्रजितां लागोनी । तें मज मुनि सांगावें ॥५०॥ ऐकोनियां श्रीरामाचें वचन । अगस्ति बोले सुखसंपन्न । मंदोदरी प्रसूत झाली जाण । बाळकें दीर्घ रुदन पैं केलें ॥५१॥ मेघासारिखें गर्जन । बाळकें ते समयी केलें जाण । तेणें लंकावासी बधिर जन । भयेंकरोन पैं झाले ॥५२॥

---

शब्दार्थ – १. स्वीकार करावा, २. लाजाहोम, ३. एकाच वेळी, ४. कशाने, ५. प्रश्न, ६. सरोवर, ७. श्रेष्ठ.

रावण येवोनि ते समयीं । मेघनाद ऐसें नाम पाहीं । ठेवोनि बाळक ते गृहीं । अंत:पुरीं वाढतें झालें ॥५३॥ रावणातें रंजवित । मातेचें मन मोहित । स्त्रियांमाजी पुत्रापत्य । असे वाढत महाबाहो ॥५४॥ मंदोदरीसी बहु हर्श । रावणासी परम संतोष । राक्षसांसी परम सुख । दीर्घ दु:ख देवांसी ॥५५॥ एक पुत्र गुणवंत सगुण । निर्गुण संतानाचें किंप्रयोजन । एक शशी जगाचा प्रकाश पूर्ण । नवलक्ष तारांगणीं काय काज ॥५६॥ जैसा कां पुरिला हुताशन । प्रज्वाळी देदीप्यमान । तैसा तो राक्षसनंदन । अंत:पुरीं वाढता झाला ॥५७॥ एका जनार्दना शरण । राक्षसांचे पाणिग्रहण । इंद्रजिताचें जन्मकथन । सांग संपूर्ण पैं झालें ॥५८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणादिपाणिग्रहणं इंद्रजिज्जन्मकथनं नाम द्वादशोऽध्याय: ॥१२॥ ओंव्या ॥५८॥

## अध्याय तेरावा

॥ श्रीरामचंद्र प्रसन्न ॥

### रावणाचे अलकावतीस गमन

तदनंतरें ब्रह्मलोकगुरू[1] । रावणासि देवोनि वरू । केला लंकेचा ईश्वरू । दोघां बंधूसमवेत ॥१॥ तिघांसि पाणिग्रहण झालें । रावणासी राज्य लाधलें । मेघनादाचें जनन सांगितलें । पुढील कथा अवधारा ॥२॥ राज्य करितां विबुधारिजनक[2] । प्रजालोक स्वस्थ सकळिक । कोणी ऐके काळीं घटश्रोत्र[3] देख । विनविता झाला बंधूसी ॥३॥ अहो जी नृपति अवधारीं । तुम्ही ज्येष्ठ बंधू आहां शिरीं । मज निद्रा बाधी भारी । काळकूटासमान ॥४॥

**मागणीप्रमाणे कुंभकर्णाला झोपण्यासाठी रावणाने मंदिर बांधून दिले :** निद्रा बाधीतसे राजेंद्रा । आवडी नाहीं भोगापचारां । मजकारणें धाम करा । सुखशयन करावया ॥५॥ ऐकोनि अनुजाचें वचन । रावण हांसिला खदखदून । विश्वकर्मा मग पाचारोन । तया आज्ञा देता झाला ॥६॥ कुंभकर्णालागीं मंदिर । करावें उत्तम सपरिकर । तेणें आज्ञापिले शिल्पकार । तें मंदिर करिते झाले ॥७॥ लांब रुंद दीर्घ बहुत । अति रमणीय मन निवे तेथ । आगबाधा तस्कराघात । नाहीं तया मंदिरीं ॥८॥ स्फटिकांचे खांब विचित्र । सुवर्णेकरोनि लिहिलें चित्र । वैडूर्यशोभा सुंदर । किंकिणीज्वाळा लाविल्या ॥९॥ मुक्ताफळांची तोरणें । लाविलीं असती गहनें । पहातां उंच गगन ठेंगणें । ऐशा मानें निर्मिलें ॥१०॥ देखतां सर्व सुख पाविजे जेथें । राक्षसाचें मन निवे तेथें । देखतां श्रमांपासून सुटिजे । निर्मिलें मेरुसमान गृहातें ॥११॥ देखोनि मनोहर स्वधाम । तेथें कुंभकर्ण करी विश्राम । बहुत वर्षे निद्रा परम । जागृति नोहे कदाकाळीं ॥१२॥ कुंभकर्ण निद्राभिभूत[4]। देखोनि दशानन काय करित । तें अवधारिजे सावचित्त । श्रोतृजनीं सादर ॥१३॥ श्रोता उदास कथेसी । ते कथा होय विरसी । जीवनेंवीण धान्यें जैसीं । सुकोनि जाती आपसया ॥१४॥ श्रोता कथेसी सादर । तरी वक्तयासि उल्लास थोर । ते कथा नव्हे क्षीरसागर । स्वाद विचित्र तेथींचा ॥१५॥

**रावणाने देवांदिकांना संत्रस्त केले :** देव ऋषि यत्र गंधर्व । सिद्ध चारण मानव । यांसि त्रासिता झाला दशग्रीव । वारिता नाहीं पैं कोणी ॥१६॥ आपुले स्वइच्छेसीं । क्रीडे उद्यानादि विचित्र वनांसीं । नंदनवनीं जळक्रीडेसी । करी बळेसीं रावण ॥१७॥ जेंवी नदीमध्ये गजपती ।

---

शब्दार्थ - १. ब्रह्मदेव, २. रावण, ३. कुंभकर्ण, ४. निद्रेनें व्याप्त.

किंवा वायु झडपे वृक्षाप्रती । कीं वज्र झगटे पर्वतीं । तैसा राक्षस विध्वंसित ॥१८॥

कुबेराने रावणाकडे दूत पाठविला : हें ऐकोनि कुबेर जाण । दूत पाचारिला अति सज्ञान । तयासि म्हणे तूं जाऊन । रावणालागून सांगावें ॥१९॥ स्वधर्म अनुकूळ रायासी । दूता सांगशील क्षात्रधर्मासी । जेणें पूर्वज होती संतोषी । त्या प्रकारासी सांगावें ॥२०॥ ऐकोनि वैश्रवणवचन[१] । दूतें मस्तक खालावून । प्रवेशला लंकाभवन । प्रथम बिभीषण भेटला ॥२१॥ बिभीषण म्हणे दूतासी । तूं कोठींचा कोण कोणा कार्यासी । आलासि हें आम्हांसी । किंनिमित्त सांगिजे ॥२२॥ दूत म्हणे बिभीषणा । मज वैश्रवणें पाठविलें जाणा । बिभीषण म्हणे धर्मज्ञा । सकळ कुशळ आहेत कीं ॥२३॥ बिभीषण म्हणे दूतासी । पैल रावण पाहें सिंहासनासीं । येरें देखोनि जयजयशब्देंसीं । रावणासी स्तविलें हो ॥२४॥ राजाधिराज लंकापती । यशस्वी भुजा तुझ्या हाती। वैरी अपधाकें पळती। इतुकें बोलोनि लीन राहिला ॥२५॥ हेमपर्यंक[२] रत्नजडित । वरी पासोडा क्षीरोदक[३] शोभत । वरी दशग्रीव बैसला तेथ । दूत बोलता झाला ते वेळीं ॥२६॥

दूताकडून रावणाला स्वधर्माचरणाचा संदेश : अहो जी ऐकें लंकेश्वरा । मी सांगतों सर्व समाचारा । तुमचा श्रेष्ठ बंधु निर्धारा । नांव कुबेर जयाचें ॥१७॥ तयानें मजला पाठविलें । मुखवचनें निरूपिलें । अवधारिजे भूपाळें । उभयकुळधर्मार्था ॥२८॥ रायें स्वधर्मातें पाळावें । दुष्टांतें दिगंतराबाहेरी घालावें । साधुसज्जनातें सेवावे । भावबळेंकरोनी ॥२९॥ पुण्याचा संग्रह कीजे । पातकातें न स्पर्शिजे । गाईब्राह्मणां प्रतिपाळिजे । क्षात्रधर्मा न टाळिजे प्राण गेलिया ॥३०॥ तुम्ही दोघे ऐश्वर्ये समान । तुम्हां दोघां एक व्रत नेम । तुमचें कुळ पूज्य परम । तपोनुष्ठान अधिक तुमचें ॥३१॥ कुबेरें जें ऐकिलें । ते मज हातीं सांगविलें । ते अवधारिजे भूपाळें । सावधान होउंनी ॥३२॥ नंदनवना करोनि भग्न । ऋषीश्वरांतें मारून । देवांचे अधिकार हिरोन । राक्षसांलागून वांटिले त्वां ॥३३॥ सुहृद सोयरे लहानथोर । बंधु आणि महावीर । हे तों घालूनी बाहेर । बहु अपूर्व त्वां केलें ॥३४॥ परी एक असे नीती । बंधु ज्येष्ठ कनिष्ठ असती । तयांतें रक्षावें भूपती । सुहृदस्थिति या नांवें ॥३५॥

कुबेराची आत्मकथा दूत रावणाला सांगतो : मी तुझे आज्ञेकरून । गेलों हिमाद्रिपर्वता जाण । तेथें नित्यनेम अनुष्ठान । इंद्रियनिग्रहण म्यां केलें ॥३६॥ सदाशिवासमीप संतत । आचरतां झालों तप व्रत । करोनियां एकाग्र चित्त । कित्येक दिवस क्रमियेले ॥३७॥ पुढें कर्मानुसार बुद्धी । भ्रम झाला मज ते संधीं । पार्वती रूपें अनुपम नीधी । शिवसहित क्रीडत होती ॥३८॥ रुद्राणीच्या रूपाची सीमा । वर्णूं न शके स्वयें ब्रह्मा। जियेतें देखोनि सुरांगना व्योमा[५] । लाजोनि ऊर्ध्व पंथें गेलिया ॥३९॥ जिच्या स्वरूपाचे प्रभावीं । चंद्र सूर्य झाले दिवी[६]। उमेसि वर्णी ऐसा कवी । कोण कोठें असेल ॥४०॥ आपण सव्य नेत्रकरीं । तिये काळीं अवलोकीं गौरी । ते गौरीचे प्रभावेंकरीं । सव्य नेत्र पडला तळीं ॥४१॥ पार्वतीचें अवलोकन मात्र । माझा भस्म झाला सव्य नेत्र । वडस वाढला पिंगळाकार[७] । काणा सत्वर मी झालों ॥४२॥ तया गिरीच्या पाठारीं । मग मी जावोनि तप करीं । आठ शत वर्षे होतां पुरीं । तंव महादेव गौरीसहित आला ॥४३॥ माझें देखोन तप दारुण । कृपाळु ते उमारमण । म्हणे झालों मी सुप्रसन्न । वैश्रवणा जाय ये समयीं ॥४४॥ तुझी देखोन तपःस्थिति । मी सुखावलों बहुत

शब्दार्थ - १. कुबेराचें भाषण, २. सोन्याचा पलंग, ३. उंची वस्त्र, ४. पार्वतीच्या, ५. स्वर्गी, ६. दिवटीप्रमाणें, ७. क्षुल्लक

चित्तीं । तूं माझा सखा निश्चितीं । तुजवरी प्रीती मज बहु ॥४५॥ उमेचे क्रोधेंकरीं । तुझ्या नेत्राची झाली बोहरी । दृष्टि देतो तया नेत्रीं । चराचर देखावया ॥४६॥ उमेसि देखिलें नेत्रेंकरीं । ते तुझें नाम एकाक्ष निर्धारीं । पिंगळेक्षण चराचरीं । दुसरे नाम पैं तुझें ॥४७॥ ऐसें शंकरासीं सख्यत्व । करोनि कुबेर नगरा येत । तंव मार्गी झालें श्रुत । रावण पाप आचरला ॥४८॥ नंदनवन करोनि भग्न । मारिले ऋषी तपोधन । ऋषीश्वरांतें त्रास देवोन । बंधुजन दवडिले ॥४९॥ तुझिया मरणाचा उपाय । चिंतिताति सुरसमुदाय । तुज येथोनि नाहीं जय । सत्य जाण शक्रजिज्जनका[1] ॥५०॥

रावणाकडून दूताची अवहेलना व स्वसामर्थ्याबद्दल दर्पोक्ती : दूताच्या मुखीचें वचन । ऐकोनि रावण क्रोधायमान । दांत खाय करकरून । काय आपण बोलिला ॥५१॥ क्रोधेंकरून नयन । ओष्ठ चावोनि रावण । दूताप्रति कठिण वचन । काय आपण बोलिला ॥५२॥ दूतासि म्हणे रावण । तूं बोलिलासि जयाचें वचन । तया आणिक दूत न मिळे जाण । तुज नपुंसका पाठविलें ॥५३॥ तूं नपुंसकाहूनि हीन । तुज ज्यानें पाठविलें तो अज्ञान । तें तुम्ही माझें अहित लक्षोन । आनेंआन बडबडितां ॥५४॥ ज्येष्ठ बंधु वैश्रवण । तया मारितां नलगे क्षण । होईल शब्द कुळदूषण । सत्य जाण पैं दूता ॥५५॥ शिवासहित असुरारी[2] । मी मारीन क्षणामाझारीं । स्वर्गमृत्युपाताळाभीतरीं । निर्वैर सृष्टि करीन मी ॥५६॥ हें करितां मज अर्ध क्षण । न लगे दूता सत्य जाण । तुज मी मारीन रावण । राक्षस भक्षण करिती तुझें ॥५७॥ आणि हे अष्टौ लोकपाळ । करीन किंकर मी सकळ । हें मज करितां न लगे वेळ । कोपें प्रबळ चालिला ॥५८॥

दूताला ठार करून अलकावतीला निघाला : आठवोनि दूताचें वचन । रावण अत्यंत कोपायमान । करीं खड्ग घेवोनि जाण । घायें दूत मारिला ॥५९॥ राक्षसांसि म्हणे रावण । याच्या अस्थि मांस करा भक्षण । तदनंतरें काय आपण । करिता झाला अवधारा ॥६०॥ पाचारोनि सारथियासी । रथ संजोगोनि वेगेंसीं । जाणें आहे अलकावती नगरीसी । जेथें वैश्रवण पैं असे ॥६१॥ मग सज्जोनियां रथ । वरी आरूढला लंकानाथ । शस्त्रसामग्री घेवोनि त्वरित । अलकावतीये चालिला ॥६२॥ एका विनवी जनार्दन । पुढे गोड निरूपण । वाल्मिकीचें वाग्रत्न । सावधान अवधारा ॥६३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणअलकावतीगमनं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥ ओंव्या ॥६३॥

## अध्याय चौदावा

॥ श्रीरघुनाथाय नमः ॥

### रावणसैन्याचा विध्वंस

रावण आपल्या चतुरंग सैन्यासह अलकावती नगरीला पोचला : पूर्वप्रसंगीं रावण । रथावरी आरूढोन । सर्वे सेना प्रधान । जेथें वैश्रवण[3] तेथें आला ॥१॥ तदनंतरें विबुधारीं[4] । चालिला अतिक्रोधेंकरीं । समवेत प्रधान साही भारी । ब्रह्मांड उलथिती पैं ऐसे ॥२॥ तयांची नांवे कोण कोण । मारीच महादेव प्रहस्त शुक सारण । सहावा धूम्राक्ष ऐसे जाण । संग्रामीं बळ दारुण ज्यांचें ॥३॥ जयांच्या पुरुषार्थापुढें । रावण कोणासी नातुडे । जैसे साही ऋतु गाढे ।

---

शब्दार्थ - १. रावणा, २. विष्णू, ३. कुबेर, ४. देवशत्रू रावण.

आपुलेनि काळे शोभती ॥४॥ तेही साही प्रधान कैसे । क्रोधें सृष्टि जाळिती ऐसे । चालिले अति आवेशें । नद्या पर्वत उल्लंघिती ॥५॥ पुरें पाटणें ग्राम नगरें । लंघीत वनें उपवनें थोरें । एका मुहूर्ते अति त्वरें । कैलासाप्रती येते झाले ॥६॥ अति पापिष्ठ रजनीचर । पावोनि कैलासपाठार । वेढिते झाले अलकानगर । तें कुबेरदूतीं देखिलें ॥७॥ दूत म्हणती कुबेरबंधु । रावण आला करावया युद्ध । तेणें सांडोनि सुहृदसंबंधु । यासीं आम्हीं झगडों नये ॥८॥ राया जाणवूं हे मात । म्हणोनि दूत निघाले त्वरित । शीघ्र वैश्रवणा जाणवित । लंकनाथ युद्धा आला ॥९॥

कुबेराची रावणाबरोबर युद्ध करण्याची सैन्याला आज्ञा : ऐकोनि दूतांचें वचन । कुबेर झाला क्रोधायमान । वेगीं म्हणे सैन्यालागून । करा म्हणे संग्राम ॥१०॥ ऐकोनि धनेशाची वचनावळी । वीर चालिले आतुर्बळी । जैसी सागराची नव्हाळी । तैसे ते काळीं चालिले ॥११॥ अश्वीं चढले एक वीर । एकीं पालाणिले कुंजर । एकीं सज्जले रहंवर[१] । पायांचें[२] मोगर[२] धांवती ॥१२॥ दोहीं सैन्यां झाली मिळणी । जैशा दोनी एक होती पुष्करिणी । वर्षती उभयतां बाणीं । वीरश्रेणी लक्षोनियां ॥१३॥

कुबेर सैन्याकडून स्वतःच्या सैन्याचा संहार झालेला पाहून रावण स्वतः युद्ध करू लागला : यक्षीं केला थोर मार । जैसा गगनीं वर्षे जळधर । रावणाचे प्रधान थोर थोर । रणीं घायाळ पाडिले ॥१४॥ आणीक राक्षस पडिले रणीं । हें दशमुखें देखोनि नयनीं । क्रोधें नेत्र आरक्त करूनी । परवीरांवरी लोटला ॥१५॥ गर्जना करोनि अत्यंत गाढी । पाताळीं शेष हडबडी । वराहाची दाढ तडतडी । कूर्म करी गाढ पृष्ठीतें ॥१६॥ गगनीं नक्षत्रें कळकळिती । शशिसूर्य चळचळां कांपती । जिग्गजांच्या कर्णांप्रती । बधिरता पैं आली ॥१७॥ गर्जनेचा नाद थोर । भेणें कांपती सुरासुर । ते काळीं प्रधानवीर । समस्त जाण एकवटले ॥१८॥ पुनरपि रणीं मिसळले । घोरांदर युद्ध करिते झाले । एकैक सहस्रेंसीं भिडते झाले । रणमंडळीं ते काळीं ॥१९॥ गदा परिघ शक्ति तोमर । घेवोनियां दशशिर । करिता झाला विकट मार । परवीरांतें देखोनी ॥२०॥

रावणाकडून यक्षसैन्याची दाणादाण : रावण रणीं खवळला । कुबेरसैन्या मारिता झाला । कित्येक वीरां निःपात केला । कित्येक निर्जीव केले रणभूमीं ॥२१॥ जेंवी वर्षे माधव[३] । तेंवी सोडोनि शर सर्व । व्यथाभूत करोनि सर्व । वीरां वीर आटिला ॥२२॥ यक्षनायकाचें सैन्य । रणमंडळीं होवोनि भग्न । जैसा वन्हि करी दहन । काष्ठांलागोन पर्वतीं ॥२३॥ मारुत वन्हीस सहाकरी । झालिया सृष्टी भस्म करी । तेंवीचि तो राघववैरी । यक्षसैन्य मारिलें ॥२४॥ समस्त प्रधानेसीं रावण । कुबेरसैन्या करूनि भग्न । कित्येक भग्नांग होऊन । समरांगणीं उलंडले ॥२५॥ कित्येक होटांसहित दांत । पडोनि रणीं कुंथत । एक भयेंकरोनि जीव देत । एक तळमळित मस्तकघातें ॥२६॥ एकांचे तुटले कर । एकांचे फुटलें शिर । एकांचे घायाळ शरीर । चेंदाचेंद होवोनि ठेली ॥२७॥ एकांसि भय अद्‌भुत । धांवोनि प्रेतामाजि लपत । एक ते फळफळां मूतत । राक्षसमार देखोनी ॥२८॥ एकांची गेली शस्त्रसंपत्ती । एक मेलीं मढीं होवोनि ठाती । ऐसी रावणें केली ख्याती । सीतापति अवधारिजे ॥२९॥ शेषसैन्य जें उरलें । तें हळुहळु संग्राम करितें झालें । त्यामध्यें कित्येक पळाले । नगरामाजि श्रीरामा ॥३०॥ यक्षसैन्या झाली भंगाणी । उरले वीर रणमेदिनीं । सांडोनि प्रवेशले पुरी तत्क्षणीं । कुबेरा मात जाणविली ॥३१॥

---

शब्दार्थ - १. रथ, २. पायदळ, ३. इंद्र, ४. पर्जन्य.

त्यामुळे संतप्त होऊन कुबेराने मारीचाला पाडले : स्वसैन्य भंगले ऐकोन । कुबेर झाला क्रोधायमान । संयुगकटक[1] बोलावून । तयातें संग्रमा पाठविलें ॥३२॥ संयुगकटकें रणीभूमीसीं । मारीचास भेदिलें वर्मांगासीं । बाणीं भेदोनियां त्यासी । रणभूमीसीं पाडिलें ॥३३॥ मुरारीनें मुर[2] मारिला । षडाननें[3] तारकासुर वधिला । शक्रें वृत्र नि:पातिला । तैसा यक्षें मारिला मारीच ॥३४॥ मारीच पडला रणमेदिनीं । जैसा स्वर्गींहूनि पडे च्यवोनी । पुण्यक्षयें मृत्युलोकीं प्राणी । तैसा प्रधान पाडिला ॥३५॥ मारीच पडिला देखोन । राक्षसेंद्र कोपायमान । वर्षता झाला शर दारुण । संयुगकटका घायाळ केलें ॥३६॥

रावणाच्या भीतीने कुबेर पळून गेला : रक्तें डवरला यक्ष । दिसे जैसा वसंतींचा पळस । रण सांडोनि पुरीं प्रवेश । पाठी देवोनि पळाला ॥३७॥ पाठी लागले राक्षसगण । नगरद्वारासमीप येऊन । पुढें झाला रावण । तंव द्वारपाळें देखिलें ॥३८॥

कुबेराच्या द्वारपाळाने रावणासह सैन्याला पळवून लावले : श्रीरामचंद्रा अवधारीं । रावण प्रवेशतां अलकापुरीं । समवेत राक्षस सुरारी । ते द्वारपाळानें निवारिले ॥३९॥ द्वारपाळ तो कैसा म्हणसी । ज्यासि यम कांपे चळचळासीं । तेजें तरी सूर्यसदृशी । रावणासीं भिडता झाला ॥४०॥ ते द्वारींचें तोरण तोडून । सूर्यभानुनामें द्वारपाळ जाण । झोडिता झाला राक्षसेंद्रालागून । रावण पळोन पैं गेला ॥४१॥ सूर्यभानु द्वारपाळ । रावणासि मारिता तत्काळ । ब्रह्मवचन होईल निष्फळ । म्हणोनि जीत सोडिला ॥४२॥ द्वारपाळमाराभेण । राक्षससैन्या दाणादाण । पळाले जीव घेवोन । पर्वत पाठारीं रिघाले ॥४३॥ एक विंवरीं प्रवेशले । एक गिरिकंदरीं रिघाले । एक नदी उतरोन गेले ।आपुलिया स्वस्थळाप्रति ॥४४॥ एक वृक्षी वळंघले । एक वृक्षबुडात रिघाले । एक पर्वतकडे बैसले । धाक घेवोनि राक्षस ॥४५॥ रावणें देवोनि पाठी । तेथोनि पळाला उठाउठीं । पुढील कथा सुरस गोमटी । भवबंधच्छेदक ॥४६॥ एका विनवी जनार्दनी । जनार्दनाची एकपणीं । सुरस कथा रामायणी । सावधान संतीं परिसावी ॥४७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणसैन्यभंगो नाम चतुर्दशोऽध्याय: ॥१४॥ ओंव्या ॥४७॥

## अध्याय पंधरावा

॥ श्रीसीतावल्लभाय नम: ॥

### कुबेराचा पराभव

तदनंतर अवनिजापती । प्रीतीं सांगतसे अगस्ती । म्हणे स्वामी ब्रह्मांडाच्या पंक्ती । उतरिसी रचिसी हेळामात्रें[4] ॥१॥ तूं ईश्वराचा ईश्वर । तू सुरवरांचा आदिइंद्र । तूंचि नटनाट्यलीलावतार । दावितोसी विनोदें ॥२॥ तूंचि प्रकृति आणि पुरुष । तूं ब्रह्मादिकांचा ईश । तूं अवतार अयोध्याधीश । तूं कथा आम्हांला पुसतोसी ॥३॥ आमचा वाढवोनि मान । आम्हांप्रति करितोसि प्रश्न । हेंचि आम्हां थोर भूषण । तूं परब्रह्म वंदिसी ॥४॥ आतां अवधारीं धरणिजारमणा । यक्षेंसीं संग्राम करतां रावणा । रक्षोगण आणिले रणांगणा । मग रावणा काय झालें ॥५॥ द्वारपाळें तोरणावरी । झोडिलां[5] रावण पळे दूरी । तदनंतरें श्रीरामा अवधारीं । कथेचिया निरूपणा ॥६॥ यक्षगण मोडिले रणीं । शतसहस्र पाडिले मेदिनीं । धनाध्यक्षें[6] देखोनि नयनीं । आपण संग्रामा निघाला ॥७॥ तेथें मणिवरनामें यक्ष । प्रतापें

---

शब्दार्थ - १. लढाई करणारे खास सैन्य, २. मुरनामक दैत्य, ३. कार्तिकस्वामीने, ४. अनायासे, ५. पराभव पावला.

अत्यंत दक्ष । सांगातें[1] वीर सहस्र लक्ष । अतियोद्धे पराक्रमी ॥८॥ गदा मुद्गल शक्ति तोमर । शूळ मुसळ लहुडी चक्र । यक्ष करिते झाले मार । रणीं राक्षस लक्षोनी ॥९॥ तेव्हां प्रहस्तें काय केलें । रणी सहस्रातें मारिलें । गदा घेवोनि निवटिलें । महोदरें सहस्रांतें ॥१०॥ श्रीरामां सावधान अवधारीं । मारीच राक्षस दुराचारी । निमेष न भरतां दोनी सहस्रवरी। रणीं यक्ष पाडिले ॥११॥ धूम्राक्षेंसीं मणिभद्र रण । करिते झाले दोघे जण । धूम्राक्षें मुसळ तोलून । मणिभद्र वक्षःस्थळीं हाणिला ॥१२॥ लागतां मुसळाचा घावो । तेणें नुलंडेच महाबाहो । तदनंतरें मणिभद्रें गदा पाहा हो । आवो साधोनि मारिली ॥१३॥ धूम्राक्षाच्या मस्तकावरी । गदा बैसली जैसी वीज शिखरीं । अचेतन धरणीवरी । पडला रक्त वाहतसे ॥१४॥ धूम्राक्ष रणीं पडिला । देखोनि रावण क्रोधा चढला । रणमेदिनीस धांवता झाला । युगांतींचा[2] अग्नि जैसा ॥१५॥ रणीं मारिता झाला शक्तिकरूनी । मणिभद्र यक्षालागोनी । झळफळित गदा यक्षें घेवोनी । राक्षसेंद्रा हाणितली ॥१६॥ यक्षगदेच्या घाईं । रावणमुकुट पडिला भुईं । सर्वेचि यक्ष पाठीसी पाहीं । रावणाच्या राहिला ॥१७॥ रावण गदाघातेंकरीं । मुकुट पडलियाचें भय न धरी । मणिभद्र यक्ष पाठीसी निर्धारीं । उभा तिष्ठत राहिला ॥१८॥ राक्षसीं सिंहनाद केला । श्रीरामा पर्वत दुमदुमिला । दुरोनि धनाधिपें देखिला । मणिभद्राचा पराक्रम ॥१९॥ मणिभद्र महाशूर । योद्ध्यांमाजी परम वीर । कुबेरें देखोनि सत्वर । काय बोलता पैं झाला ॥२०॥ म्हणे ब्राह्मणाच्या शापोक्ती[3] । रावणाची यशःकीर्ती । आणि ऐश्वर्यसंपत्ती । भस्म झालीं द्विजशापें ॥२१॥

रावणाची निंदा : कुबेर दीर्घवचनें बोले । रावणें कुळा लांछन लाविलें । देवां द्विजां दुःख दिधलें । तें भोगी रे निजकर्म ॥२२॥ दुष्टा नष्टा चांडाळा । तुवां भक्षिलें ऋषिकुळा । देवांतें त्रास दिधला । तें भोगीं रे निजकर्म ॥२३॥ निरपराधें वनांतरीं । तुवां द्विज भक्षिले यष्टिवरी । तया पापाची सामग्री । तूं अधोरीं पडसील ॥२४॥ उपजोनियां ब्रह्मवंशीं । लाज लाविली कुळासी । तुजसारिखा पापिष्ठ सृष्टींसी । म्यां नाहीं रे देखिला ॥२५॥ तूं झालासी नरकाचा पाहुणा । तुजविण नरक नाहीं दुणा । नरका जावें न लगे रावणा । नरकप्राय तूंचि तूं ॥२६॥ जो आवडीनें विष प्याला । तो परिपाकीं जण निमाला । तैसें रावणा झालें तुजला । ब्राह्मणाचे शापेंकरीं ॥२७॥ मूढ आरूढोनि वृक्षावरी । बैसला ते फांदी कुठारेंकरीं[4] । तोडितां पडे भूमीवरी । तैसे रावणा तुज झालें ॥२८॥ बाजगिराचें[5] वानर जैसें । तो नाचवी नाचे तैसे । तुझे प्रधान अजाण तैसे । त्यांचेनि वचनें वर्तसी ॥२९॥ जो स्वधर्माचा त्याग करी । पापियाचें व्रत अंगीकारी । तयासी यमराज आपुले स्वपुरीं । यमपाशीं बांधोनि ने ॥३०॥ ज्येष्ठांतें न वंदिती । हेळण करोनि निर्भर्त्सिती । ते नर यमा वश होती । जाण निश्चितीं रावणा ॥३१॥ नाशवंत शरीर । याचे ठायीं आदर फार । न करोनी वंचिती परोपकार । यमाधीन पैं होती ॥३२॥ नाशवंत हा संसार । जाणोनि न करी भजनसार । मूढबुद्धि हा पामर । नरक घोर तो भोगी ॥३३॥

रावणाने संतापून पुन्हा युद्धास सुरुवात केली : ऐकोनि वैश्रवणाचें वचन । कोपें आरक्त पूर्ण नयन । कुबेराप्रति दशानन । संग्रामासी मिसळला ॥३४॥ प्रधान विमुख झाले होते । तेही घेतले सांगातें । भग्न झाला रावण पुनरपि तेथें । संग्रामातें करिता झाला ॥३५॥ मणिभद्रें भग्न

---

शब्दार्थ – १. बरोबर, २. प्रलयकालींचा, ३. शापवचने, ४. कुऱ्हाडीने, ५. डोंबाऱ्याचे.

केला । माथींचा मुकुट पाडिला । तो रावण नाहीं श्रांतला[1] । नाहीं श्रमला संग्रामीं ॥३६॥ श्रीराम म्हणे जी अगस्ती । संग्राम करितां मणिभद्राप्रती । शिरींचा मुकुट पाडिला क्षितीं । श्रम कां चित्तीं नाहीं झाला ॥३७॥ अगस्ति म्हणे श्रीरामा । यासि वर देता ब्रह्मा । वरबळें पुरुषोत्तमा । यक्ष गंधर्व न गणीच ॥३८॥ हा रावण पुढतीं । युद्ध करी बंधूप्रती । तें अवधारीं धरणिजापती । आश्चर्य थोर होईल ॥३९॥ येरीकडे कुबेर जाण । अग्न्यस्त्र सोडिले दारुण । राक्षस झाले कंपायमान । अग्नि जाळितो उरीं शिरीं ॥४०॥ जैसा पळयींचा अग्नी । पसरे त्रैलोक्य व्यापूनी । तैसी कुबेरास्त्रापासूनीं । अग्निमयी रणभूमी ॥४१॥ रावणें वरुणास्त्र घातलें । क्षणामाजी अग्नीतें शांत केलें । पृथ्वी परिपूर्ण झाली जळें । सरोवर नद्या भरियेल्या ॥४२॥ रावणें राक्षसी माव केली । अदृश्य झाला तये काळीं । मागून बंधूचे हृदयकमळीं । येवोनि गदा हाणितली ॥५३॥ दशग्रीव कपटी क्रूर । दुरात्मा महा मावकार[2] । समरांगणीं सत्वर । अदृश्य झाला ते काळीं ॥४४॥ अदृश्य येवोनि तये काळीं । धनेशाचें हृदयकमळीं । गदा हाणितली तेणें भूमंडळीं । पाडिला जैसा पर्वत ॥४५॥ वसंतीं पलाश[3] आरक्त । पुष्पीं फळी वन शोभत । तैसा कुबेर रुधिरांकित[4] । रणमेदिनीं उलंडला ॥४६॥ अशोक वृक्ष मूळेंसीं । उलंडोनि पडे भूमीसीं । तैसा कुबेर रणभूमीसीं । पडला तरु पैं जैसा ॥४७॥ तदनंतरें प्रधान मिळोन । नंदनवनास कुबेर नेऊन । परस्परीं विचारून । उपचार करिते झाले ते काळीं ॥४८॥ आरोग्य व्हावया शरीरीं । जैसा धन्वंतरी उपचार करी । तैसे प्रधानीं थोरथोरीं । उपचार कुबेरीं मांडिले ॥४९॥

कुबेराचा पराभव करून रावणाने पुष्पक विमान नेले : येरीकडे श्रीरामा । रावण तो पापकर्मा । मग प्रवर्तला अधर्मा । पुष्पक विमाना हरिता झाला ॥५०॥ पुष्पक विमानाची स्थिती । ऐक योगियांच्या ध्येयमूर्ती । चिंतिल्या स्थळासी शीघ्रगती । मनोवेगेंकरोनि जाय ॥५१॥ मनोवेगातें सांडोनि मागें । विमान जाय अति वेगें । म्हणोनि कामग[5] ऐसें निजांगें । ज्ञातें पंडित बोलती ॥५२॥ तया विमानावरी । आरूढोनि श्रीरामा तुझा वैरी । आनंदें गर्जत ते अवसरीं । कैलासाप्रती चालिला ॥५३॥ कुबेरातें जिंतोनि राक्षस । येता झाला कैलासास । पुढील कथा अति सुरस । सावध श्रोतीं परिसिजे ॥५४॥ वाल्मीकाच्या ग्रंथाधारें । संताचेनि कृपाभरें । कथा चालिली पुढारें । गोड निरूपण पैं आहे ॥५५॥ एका विनवी संतजनां । तुमच्या प्रसादाचा पान्हा । तेणें वदलों बोबड्या वचना । बाळपणा लक्षोनि ॥५६॥ एका जनार्दना शरण । पुढें रम्य सुरस गहन । कथा ऐका रामायण । दत्तचित्त होवोनी ॥५७॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां वैश्रवणभंगो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥ ओंव्या ॥५७॥

## अध्याय सोळावा

॥ श्रीसीतापतये नमः ॥

### शंकराचे रावणाला वरदान

मागिले प्रसंगीं वैश्रवण । रणभूमीस झाला भग्न । मागें रावणें पुष्पक हिरोन । वरी आरूढोन निघाला ॥१॥ सर्वे प्रधान थोर थोर । मारीच प्रहस्त महावीर । विमानीं आरूढोनि वनें घोर । लंघिते झाले ते काळीं ॥२॥ षडाननाचें[6] जन्मस्थान । ते देखिलें शरवण वन । तेथें शर होती

शब्दार्थ - १. श्रम पावला, २. मायावी, ३. पळस, ४. रक्ताने माखलेला, ५. इच्छेनुसार जाणारे, ५. कार्तिकस्वामीचे.

उत्पन्न । यालागीं शरवण बोलिजे ॥३॥ तदनंतरे पौलिस्तिकुमर । देता झाला वन सुंदर । वृक्ष वल्ली अपार । अति मनोहर देखिलें ॥४॥ तेजें अत्यंत साजिरें । सुवर्णमयचि साकारें । उपमा देतां भास्करें । किरणजाळ सोडिलें ॥५॥ तया वनप्रदेशीं कैलासगिरी । असे जैसा मेरु धरित्रीं । त्याच भागीं शोभा साजिरी । पुष्पक तेथें येतें झालें ॥६॥

**कैलासपर्वतावर येताच पुष्पक विमान एकाएकी थांबले :** पुष्पकें देखिला कैलास । पुढें न चाले राहिले सावकाश । गति खुंटली देखोनि राक्षस । थोर आश्चर्य पावला ॥७॥ अत्यंत प्रतापी रावण । चिंताक्रांत म्लानवदन । प्रधानाप्रति काय वचन । बोलता झाला ते समयीं ॥८॥ हें पुष्पक विमान । न चाले गति खुंटोन । येथें राहिलें कोण कारण । निर्धार पूर्ण लक्षेना ॥९॥ पर्वतासारिखें पुष्पकविमान । पर्वतमाथां राहिलें जाण । कोण कर्म वैभव कोण । काय कारण राहिलें ॥१०॥

**रावणाची चिंता ओळखून त्याचे कारण मारीचाने सांगितले :** दशग्रीव ऐसें बोलिल्यावरी । ऐकोनि मारीच सारांश उत्तरीं । बोलता झाला शब्दचातुरीं । म्हणे अवधारा लंकेशा ॥११॥ हें जें पुष्पक विमान । निष्कारण कां पतन । पर्वतमाथां वळंघोन । कोणें कर्में राहिलें म्हणसी ॥१२॥ निश्चितेसीं राजचूडामणी[1] । पुष्पक कुबेराचें म्हणोनी । पुढें न चालें मार्ग खुंटोनी । राहिलें हें पर्वतमाथां ॥१३॥ कुबेराचें विमान । तेथें आरूढे वैश्रवण[2] । तयावीण न चाले जाण । रहावया मूळ हेंचि यासी ॥१४॥

**इति वाक्यांतरे तस्य करालः कृष्णपिंगलः । वामनो विकटो मुंडी दंडी ह्रस्वभुजो बली ॥१॥**
**ततः पार्श्वमुपागम्य भवस्यानुचरोऽब्रवीत् । नंदीश्वरो वचश्चैनं राक्षसेंद्रशंकितः ॥२॥**

**आकाशातून आलेल्या प्रचंड गर्जनेने रावणादि सर्व राक्षस भयभीत :** इतुकें मारीच बोलिल्यावरी । तंव गगनमार्गीं एकसरी[3] । हाक फुटली तेणेंकरीं । रावण थोर गजबजिला ॥१५॥ ऊर्ध्व अवलोकिती राक्षसगण । तंव अकराळ विकराळ वदन । प्रभा कृष्ण पिंगळ पूर्ण । स्वरूप भयानक देखिलें ॥१६॥ खुजट शरीर विकट[4] वदन । मस्तकीं बोलका हातीं दंड जाण । भुजा लहान पराक्रम गहन । येवोनि गर्जन तेणें केलें ॥१७॥ तदनंतरें ईश्वरसेवक[5] । पार्श्वभागीं आला एक । नंदिकेश्वरनामें देख । बोलता झाला ते वेळीं ॥१८॥ नंदिकेश्वराचें वचन ऐकोन । दशग्रीव शंकित होवोन । पुढें काय बोलिला ईश्वरगण । श्रोतीं सावधान अवधारिजे ॥१९॥

**निवर्तस्व दशग्रीव शैले क्रीडति शंकरः । सुपर्णनागयक्षाणां देवगंधर्वरक्षसाम् ॥३॥**
**सर्वेषामेव भूतानामगम्यः पर्वतः कृतः ॥४॥**

**नंदीने रावणाला तेथून ताबडतोब निघून जाण्यास सांगितले :** वदता झाला नंदिकेश्वर । रावणा येथोनि परता सर । पर्वतीं क्रीडती श्रीशंकर । सवें भवानी[6] पैं असे ॥२०॥ उमेसहित चंद्रमौळी । आनंदें क्रीडती ये शैलीं । तू येथोनि शीघ्रकाळीं । जाय आणिके स्थळाप्रति ॥२१॥ गरुडयक्षसर्पांसी । देवगंधर्वराक्षसांसी । आणिक भूतें भूमंडळवासी । त्यांसहि पर्वत हा वर्जिला ॥२२॥ नंदिकेश्वराचें वचन । ऐकोनि दशग्रीव कोपायमान । क्रोधें मस्तक डोलवोन । कानींचीं कुंडलें झळकती ॥२३॥ क्रोधें थरथरां कांपत । नेत्र करोनि आरक्त । पुष्पकावरोनि बोलत । कोण शंकर कैंचा रे ॥२४॥

---

शब्दार्थ - १. राजश्रेष्ठा, २. कुबेर, ३. एकदम, ४. भयंकर, ५. शंकर सेवक, ६. पार्वती.

रावणाचा उन्मत्तपणा : कैंचा शंकर कोण उमा । शैलीं कां क्रीडतसे अधमा । तयाचें भय दाविसी आम्हां । इये पर्वतापाठारीं ॥२५॥ दुरुक्ती रावणाचें वचन । तेणें नंदिकेश्वरें ऐकोन । दिव्यशूळ करीं घेवोन । क्रोधें नयन वटारी ॥२६॥ ऐशियातें रजनीचर । देखोनि म्हणती हें वानर । आम्हांसि भेडसावितें थोर । म्हणोनि हेळणा मांडिली ॥२७॥ पहा हो कैसें आश्चर्य वाटे । आम्हासिं भेडसावितें मर्कट । याचें मुखावलोकन पहाटे । करितां प्राणी कष्टी होय ॥२८॥

नंदीची भविष्यवाणी : ऐकोनि दशग्रीवाचें वचन । क्रोधें नंदिकेश्वर आपण । बोलता झाला सावधान । श्रवण कीजे सादरें ॥२९॥ तूं माझी हेळणा करिसी । नेणसी माझ्या प्रतापासी । मारितां तुज या समयासी । मद्भक्तींसीं उचित पैं नाहीं ॥३०॥ तुझ्या वधालागीं दशानना । मजसारिखे मुख्य जाणा । बळें पालथें करिती त्रिभुवना । यद्वीर्या[1] सरी नसे कोठें ॥३१॥ बळरूप पराक्रम जाण । वानर होती अति दारुण । ते तुझिया कुळाचें नाशन । निमेषें पूर्ण करितील ॥३२॥ नख दंष्ट्रा[2] हातियेर । संग्रामीं मदोन्मत्त थोर । एकैक वानर पर्वताकार । अगणित वीर उपजती ॥३३॥ ते वानर बळेंकरीं । तुझिया कुळाची बोहरी[3] । करितील क्षणामाझारीं । राक्षसां उरी नुरेल ॥३४॥ मज मारिता तुम्हांसी । अशक्य नाहीं निश्चयेंसीं । परी ये समयीं मी न मारीं तुम्हांसीं । कार्यकारण पुढें असे ॥३५॥ स्वर्गीं देवविमानपंक्ती । नंदिकेश्वराच्या वचना मानवती । पुष्पवर्षाव सुरवर करिती । नाना शब्दें स्तवोनियां ॥३६॥ नंदी म्हणे दशानन । तुझें पूर्व कर्म जाण । मारिलें असतां मी आपण । बोल लागेल भविष्या ॥३७॥ नंदीचें वचन ऐकोन । कोपें खवळला रावण । मग केलें गडगर्जन । नादें पर्वत दुमदुमिला ॥३८॥

रावणाचा कैलास उपटण्याचा निश्चय : मज जातां आकाशपंथें । खुंटविलें माझ्या विमानातें । तरी मी या पर्वतातें । मूळासहित उपडीन ॥३९॥ पर्वत उपडोनि सागरीं । निमग्न करीन निर्धारीं । काय कारण त्रिपुरारी । नृपासारिखा क्रीडतसे ॥४०॥ राक्षसांसी हें भयानक स्थान । तें मी निर्भय करीन जाण । ऐसें बोलोनियां आपण । काय करिता जाहला ॥४१॥ रावणभुजबळाची थोरी । विसां भुजीं कैलासगिरी । वेढिला तेणें अंदोळेंकरीं । एकवीस स्वर्गें डळमळलीं ॥४२॥

रावणाच्या अद्भुत पराक्रमाने कैलास डळमळू लागला : भुजाबळेंकरोनि दशानन । कैलास हालविला पराक्रमें जाण । देव झाले कंपायमान । कोण विघ्न ओढवलें ॥४३॥ ऋषीश्वरां सुटला पळ । म्हणती ओढवला प्रळयकाळ । पालथा होऊं पाहे ब्रह्मांडगोळ । भंगा भूगोळ जाऊं पाहे ॥४४॥ उमा झोंबे नीळकंठा । रमा थापटी वैकुंठा । कोणें मांडिलें संकटा । सुरश्रेष्ठा चिंतामणे ॥४५॥ तदनंतरें श्रीरघुपती । काय करिता झाला कैलासपती । अंगुष्ठ चेपूनि पर्वतीं । सुरव्यथा[4] निवारण करी ॥४६॥

शंकराने अंगठ्याने कैलास चेपून रावणाला पर्वताताळी दडपला : लीलेकरोनि महेश । अंगुष्ठें चेपितां पर्वतास । रावण झाला कासावीस । मेटें वळलीं तयांची ॥४७॥ रावण भुजा परत्या करी । तंव त्या जडल्या बळें भारी । सुटका नव्हे कवणेपरी । दांत चावी राक्षस ॥४८॥ भुजा नसुटती तेथ । सर्व शक्ति जाहली व्यर्थ । दशानन अति आक्रंदत । ओरडत अति दुःखें ॥४९॥ हांक फोडितां लंकापती । त्रैलोक्य भयभीत चित्तीं । हांक ऐकोनि प्रधान भीती । मांडला म्हणती प्रळय आजी ॥५०॥ हांक ऐकोनि दुर्धर[5] । आसन सांडोनि देवेंद्र । म्हणे फुगला समुद्र । मर्यादा सांडूं पाहतसे ॥५१॥ पर्वताचें हृदय तडाडिलें । वायुमंडळ स्तब्ध झालें ।

शब्दार्थ – १. ज्यांच्या पराक्रमाला २, दाढा, ३. नाश, ४. देवांचे दुःख, ५. भयंकर.

कळिकाळ कांपे चळचळें । नभीं अभ्रें दाटलीं ॥५२॥ मंगळाची[1] जननी[1] थरारली । नभींची नक्षत्रें च्यवली[2] । दिग्गजांचीं दोंदें तडाडिलीं । कांपों लागले शशिसूर्य ॥५३॥ यक्ष आणि विद्याधर । सिद्ध चारण किन्नर । बोलते झाले प्रळय थोर । चंद्रशेखर निवारिता ॥५४॥ समस्त करिताती स्तवन । गिरिजापति तुज अनन्यशरण । आम्हांसि रक्षिता तूंचि जाण । कायावाचामनेंसीं ॥५५॥ कृपाळुवा उमाकांता । त्रिपुरांतका विश्वनाथा । तुजवांचोनि आम्हां तारिता । नाहीं दुजा भूमंडळीं ॥५६॥ प्रधान म्हणती दशानना । तूं जाय शिवासि शरणा । तो हे निवारील विघ्ना । अनमाना नको करूं ॥५७॥

रावणाची शिवस्तुती व शरणागती : येरीकडे दशानन । करिता झाला शिवस्तवन । नाना स्तोत्रें मंत्रे जाण । शिव प्रसन्न तेणें केला ॥५८॥ प्रेमसिंधु गिरिजापती । कैलासींचा भोळा चक्रवर्ती । ऐकोनि रावणाची स्तुती । तत्काळ उडी घातली ॥५९॥ मस्तकीं जटाजूट साजिरा । तया तळीं नेत्र तिसरा । जेणें जाळिलें रतिवरा[3] । जो योगीश्वरा निजवंद्य ॥६०॥ मुकुटीं मंदाकिनी[4] पापनाशिनी । जे जन्मली विष्णूच्या चरणीं । जिचें नाम घेतां वदनीं । पापें दिशा लंघिती ॥६१॥ भाळीं विभूतिलेपन । तयावरी चंद्र विराजमान । शोभे हातीं नरकपाळ घेऊन । रुंडमाळा कंठी रुळे ॥६२॥ अंगीं भस्म चर्चिलें । वरी रुद्राक्ष मिरवले । व्याघ्रांबर परिधान केलें । तत्काळ आला समीप ॥६३॥ रावणें देखोनि उमापती । प्रणिपात करी नम्रवृत्ती । म्हणे स्वामी कृपामूर्ती । त्राहि[5] त्राहि महादेवा ॥६४॥ सहस्र वर्षेपर्यंत । रडत होता दशानन तेथ । महादेव होवोनि विस्मित । थोर आश्चर्य मानिलें ॥६५॥

रावणाच्या स्तुतीने शंकर प्रसन्न : महादेव म्हणे तुझें स्तवन । ऐकोनि झालों सुप्रसन्न । या पर्वतापासोनि मुक्त जाण । भुजा तुझ्या होतील ॥६६॥ तुवां केली दीर्घ रव[6] दारुण । त्रैलोक्य झालें कंपायमान । तस्मात् तुझें नाव रावण । देवयक्षगण म्हणतील ॥६७॥ शीघ्र येथोनि लंकापती । जाईं आपुल्या स्वस्थळाप्रती । जें वांच्छा असेल चित्तीं । ते पावसी शीघ्रकाळें ॥६८॥ ऐसें महेश बोलिल्यानंतरें । रावण म्हणे जी दातारें । कृपा केली तरी माझीं वचनोत्तरें । सावकाश ऐकावीं ॥६९॥

रावणाची मागणी : प्रसन्न झालासि महादेवा । तरी मज बरवा वर द्यावा । पूर्वी म्या तपोबळें ब्रह्मदेवा । अवध्यता मागितली ॥७०॥ चतुराननें वरदान । मज दिधलें जें यक्षगण । विद्याधर देव राक्षस दारुण । यांचेनि तुज मृत्यु नाहीं ॥७१॥ दीर्घ आयुष्य मज झालें । तें भोगितां चित्त उबगलें । आतां काहीं असेल जें उरलें । लाविलें मीं तुझ्या ध्यानीं ॥७२॥

शंकराने रावणाला खड्ग देऊन विष्णुहस्ते मरण येईल असे सांगितले : ऐसे रावणाचें वचन । ऐकोनियां शैलजारमण । चंद्रहास्य खड्ग दारुण । रावणालागीं दिधलें ॥७३॥ आयुष्याचे अंतीं जाण। तुज विष्णुहस्तें मरण । अंतकाळीं माझ्या समीपतेस । तू येशील लंकापति ॥७४॥ याउपरी त्रिपुरांतकें जाण । दशानना नाम रावण । ठेवोनि चंद्रहास्य खड्ग देवोन । आपण कैलासाप्रति गेला ॥७५॥ रावण आरूढोनि विमानावरी । चंद्रहास्य खड्ग घेवोनि करीं । विचरता झाला सवें मंत्री । प्रहस्तादिक मारीच ॥७६॥ अगस्ति म्हणे श्रीरामा । मग तो रावण पापकर्मा । प्रतर्वेला थोर अधर्मा । क्षत्रियांतें जिंकिता जाहला ॥७७॥ क्षत्रिय राजे थोर थोर । तयां बाधा करी दशशिर । कोणी भयेकरोनि देशांतर । करिते झाले रावणधाकें

शब्दार्थ – १. पृथ्वी, २. गळलीं, ३. मदनाला, ४. गंगा, ५. रक्षण कर, ६. आक्रोश.

॥७८॥ कोणी म्हणती रावण । आम्ही तुम्हां सेवकांसमान । ऐसी सृष्टि जिंकीत रावण । पुढें पुढें चालिला ॥७९॥ एका जनार्दना शरण । पुढें वेदवती आख्यान । रसाळ आणि रम्य जाण । सावधान अवधारा ॥८०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणशिववरदो नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥ ओंव्या ॥८०॥ श्लोक ॥४॥ एवं ॥८४॥

## अध्याय सतरावा

॥ श्रीरामाय नमः ॥

वेदवतीचे आख्यान

अगस्ति जो महामुनी । कथा सांगे श्रीरामा लागूनी । ते कथा सुरस भवनाशिनी । सावधान श्रवणीं ऐकावी ॥१॥ रावण विचरतां महीतळीं। हिमाद्रीच्या वनस्थळीं । समवेत प्रधान बळी । राक्षस न्याहाळी[1] भूमंडळ ॥२॥

लंकेला जाताना रावणाला सुकुमार कन्येचे दर्शन : प्रधानांसमवेत दशानन । पुष्पकावरी आरूढोन । उल्लंघितां वनोपवन । हिमवंतासमीप[2] आला ॥३॥ पुढें देखिलें कन्यारत्न । सुरस सुकुमार कमलनयन । मस्तकीं जटा कृष्णाजिन । तापसवेषें शोभली ॥४॥ विधिपूर्वक अनुष्ठान । जैसें करिती ऋषि देवगण । तैसी ते सुंदरी पूर्ण । तपें दारुण तपतसे ॥५॥ रावणें देखतां कन्यारत्न । सुशील सुव्रत गुणसंपन्न । काममोहित भ्रांत होऊन । हास्यवदनें पुसता झाला ॥६॥ अवो भद्रें[3] अवधारीं । तू एकली या वनांतरीं । रूप तरी देवांगना तुज सरी । न पावती पाहतां ॥७॥ कोण कोणाची काय कारण । तुज योग्य तप नव्हे जाण । तूं कां करिसी अनुष्ठान । याचें कार्य कांहीं नाहीं ॥८॥ कासयाकारणें सुंदरी । तू एकली या वनांतरीं । तुझा भ्रतार या विजनामाझारी[4] । आहे कीं नाहीं हे सांगें ॥९॥ तुझें रूपयौवन । जो भोगी तो भाग्याचा गहन । त्याच्या पुण्या मर्यादा जाण । केली व वचे राजबळे ॥१०॥

रावणाने विचारल्यावरून वेदवतीने आपली माहिती त्याला सांगितली : ऐकोनि रावणाचें वचन । मग ते वेदवती आदरेंकरून । रावणाचें आतिथ्य जाण । करोनि कथन सांगतसे ॥११॥ देवगुरु जयातें म्हणती । तयाचा सुत कुशध्वज नृपती । बुद्धिवंत दुसरा बृहस्पती । तपे तेजें आगळा ॥१२॥ वेदाभ्यास शास्त्रव्याख्यान । आणि अग्निहोत्र पंचमहायज्ञ । देवतार्चन पितृतर्पण । भगवद्भजन सर्वभूतीं ॥१३॥ कुशध्वज वेदाभ्यास करी । तो माझा पिता निर्धारीं । मी वाढिलें तयाचें घरी । नाम वेदवती प्रसिद्ध ॥१४॥ माझा देखोनि यौवनभर । पिता वरविचारणीं तत्पर । तैं आले यक्षविद्याधर । आणि दैत्य राक्षस ॥१५॥ आले सिद्ध ऋषीश्वर । आले पृथ्वीचें नृपवर । आले पाताळीचें विखार[5] । गंधर्व किन्नर येते झाले ॥१६॥ सभा दाटली राजभवनीं । माझा पिता पाहे न्याहाळूनी । कोणी वर न बैसे मनीं । विष्णूवांचोनि तयाचे ॥१७॥ समस्तां अभिप्राय कळला । म्हणती कोणा नेदी हे बाळा । आतां वधूं या भूपाळा । कन्या तत्काळा घेवोनि जावूं ॥१८॥ ऐसें एकमेक संवादले । संग्रामातें प्रवर्तले । युद्ध करितां परस्पर मेले । सांगों काय राजेंद्रा ॥१९॥ शुंभनामें दैत्यें काय केलें । माझिया पित्या निद्रित देखिलें । रात्रीं येवोनि चांडाळें । रायातें भक्षिलें ते काळीं ॥२०॥ पिता निमाला ऐकोन । माझे मातेनें केले सहगमन । मी उत्कंठा पित्याची जाणून । विष्णूचिंतन

शब्दार्थ - १. पाही, २. हिमालयपर्वतापाशीं, ३. सुलक्षणीं स्त्रियें, ४. एकांत प्रदेशीं, ५. सर्प.

करीतसें ॥२१॥ पितयाच्या मनीं होतें । जे कन्या द्यावी विष्णूतें । हे जाणोनि मी येथें । अनुष्ठान करीतसें ॥२२॥ इतुके सायास विष्णुप्रीत्यर्थीं । मी करीतसें अतिथी । हा देह विष्णुभाग निश्चितीं । त्याचें त्यास समर्पण ॥२३॥ जनकप्रतिज्ञा जाणोन । मी करितें अनुष्ठान । कायावाचामनेंकरून । श्रीरमारमण पावावया ॥२४॥ व्रतनेमउपवासीं । वनीं विचरतें मी ऐसी । पितयाची उत्कंठा पावावयासी । ये पर्णकुटीसीं राहिलें ॥२५॥ हें माझे कथन । तुजप्रती केले निवेदन । अगा पौलस्त्यामजा शीघ्र गमन । येथोनियां तूं करीं ॥२६॥

रावणानें विवाहासाठी तिलाच मागणी घातली : रावण म्हणे कन्येसी । म्यां जाणितलें तुझिया स्वधर्मासी । एकली तूं वनवासीं । रहावयासी योग्य नव्हे ॥२७॥ जयाकारणें करिसी तप । तो विष्णू अति अल्प । तया नाहीं नांवरूप । सत्य संकल्प हा माझा ॥२८॥ विष्णु काय बापुडें दीन । तयागांठीं नाहीं धन । आणि असे पराधीन । सत्य जाण सुंदरी ॥२९॥ अवो भद्रे अवधारीं । मी जाणतों तुझ्या तपाची थोरी । तुजसारिखी आणिक नारी । नाहीं दुसरी कनकप्रभे[१] ॥३०॥ आतां तूं वो झडकरीं । वेगी आरूढें विमानावरी । कंदर्प[२] मज पीडितो भारी । तुझे रूप देखोनी ॥३१॥ तुझिया रूपाची पदवी । तेजें लोपला चंद्र माधवी[३] । आणिक उपमा तुज द्यावी । वृथा वाणी श्रम होय ॥३२॥ तुझें अंगीं तरुणपण । तुज तप अयोग्य जाण । जयांची इंद्रियें विकळ वार्धक्यपण । तिहीं अनुष्ठान करावें ॥३३॥

रावण स्वत:चे सामर्थ्य वर्णितो : मी लंकेचा आहें राजा । तूं माझी होय भाजा । विविध भोग भोगीं माझा । सुखसंतोष पावूं दोघें ॥३४॥ तूं अत्यंत सुकुमार । अंगीं खुपती चंद्रकर । तूं मृगनयना सत्वर । विमानावर आरूढें ॥३५॥ आधींच तूं राजबाळ । त्याहीवरी सुकुमार वेल्हाळ । तुझिया तपाचा हा काळ । नव्हे प्रबळ यौवन तुझें ॥३६॥ या त्रैलोक्यामाझारी । रूपयौवनकटाक्षकरीं । पाहतां नाहीं दूसरी । म्यां आपुले नयनीं देखिलीसे ॥३७॥ तुझिया रूपाचें लावण्य । त्यापुढें विष्णु बापुडें दीन । तूं करीं वो माझे वरण[४] । समपाड जाण तुज मज असे ॥३८॥ मी तंव ब्रह्मयाचा नातू । पौलस्तिमुनीचा सुतू । आणि लंकेचा नाथू । सेवेसी रतू शिवाचे ॥३९॥ ऐकोनि रावणाचे वचना । वेदवती बोले झणें या वचना । बोलता तुज उरी दशानना । नुरे जाण शीघ्रकाळें ॥४०॥

वेदवतीने केलेल्या अपमानामुळे रावणाने संतापून बलात्काराने तिला पकडून विमानात बसविले : ऐसें वदली वेदवती । ऐकोनि रावणा क्रोध चित्तीं । वेणी धरोनि ते सती । बळें आसुडिता जाहला ॥४१॥ ऐसें करोनि लंकाघती । करीं धरिली वेदवती । बलात्कारें पुष्पकाप्रती । वाहता झाला ते समयीं ॥४२॥ रावणें हातीं धरितां जाण । वेदवती क्रोधायमान । नेत्रींहूनि निघतां हुताशन । काय वचन बोलिली ॥४३॥ शब्दें करूं पाहे दहन । रागें रावणाकडे पाहोन । बोलती झाली कोपायमान । सावधान अवधारा ॥४४॥

वेदवतीची शापवाणी : अरे नष्टा चांडाळा । त्वां बोल लाविला ब्रह्मकुळा । मज धरिलें त्वां बरळा । मरण कुळा आणिलें ॥४५॥ मी तप करित होतें । तुवां पापदृष्टीं पाहिले मातें । माझेनि शापें वंशातें । नाश होईल रावणा ॥४६॥ ये वनीं मी तप करीत होतें । तुवा विघ्न केलें मातें । तरी मी भस्म करितें तप:सामर्थ्यें । परी पुढें जन्म घेईन मी ॥४७॥ आतां मी अग्निभीतरीं । उडी घालितें निर्धारीं । आपुलेनि सामर्थ्येंकरीं । राक्षसबोहरी करीन मी ॥४८॥ यालागी रे

शब्दार्थ - १. कनकाप्रमाणे शोभणाऱ्या स्त्रिये, २. काम, ३. शरदऋतूंतील, ४. पाणिग्रहण.

रावणा । तुझिया वधालागीं जाणा । अवतरेन मी पुन्हां । राक्षसगणा वधावया ॥४९॥ तुज वधावया झडकरी । मी कां वेंचूं तपाची थोरी । पुढें जन्मोनि तुझी बोहरी । जाण निर्धारीं करीन ॥५०॥ मी अयोनिजा[1] कुमारी । त्वां मज पापदृष्टीकरी । धरिलें त्याचें फळ पुढारी । जाणवेल लंकेशा ॥५१॥ पुढें धर्मिकाचे घरीं । अवतरेन जाण निर्धारीं । तो कोण म्हणसी जाण तरी । मिथिलापुरीचा नृपवर ॥५२॥ जो राज्य करोनि विदेही । जो ज्ञानाचा सागर पाहीं । जो प्रतिपाळी ब्राह्मण गाई । तयाच्या गृहीं अवतरेन ॥५३॥

वेदवतीचा अग्निप्रवेश : ऐसें बोलोनि वेदवती । प्रवेशली जातवेदाप्रती[2] । स्वर्गीं देवविमान-पंक्ती । पुष्पवर्षाव तिहीं केला ॥५४॥ ते वेदवती कुमारी । विदेही जनकाचे घरी । पुढती जन्मली सुंदरी । जानकी नाम जियेचें ॥५५॥

वेदवतीच जनकाघरी अवतीर्ण होऊन रामभार्या सीता झाली : ते तुझी भार्या श्रीरघुपती । श्रीरामा तूं जाण निश्चितीं । ते जनकाघरीं वाढली सती । जानकी ऐसे नाम जिचें ॥५६॥ ऐकोनि जानकीचे कथन । श्रीरामें आश्चर्य पावोन । म्हणे आपली प्रिया धन्य धन्य । कष्ट दारुण देखिले ॥५७॥ अगस्ति म्हणे श्रीरामा । तूंचि केवळ विष्णु सर्वोत्तमा । पूर्वक्रोधें राक्षसधमां । वैरभावें मारिलें ॥५८॥ पुढें ते वेदवती कुमारी । दुसरा जन्म धरिला निर्धारीं । सापडेल शेताभीतरीं । सीता नाम म्हणतील॥५९॥ कृतयुगीचें कुशध्वजउदरीं । ते वेदवती प्रसिद्ध थोरी । पुढें तेचि त्रेतायुगाभीतरीं । शेतामाजि सांपडेल ॥६०॥ इतुकें झाले जनकपुरीं । विदेही जनकाचिये घरीं । नाम पावली जानकी सुंदरी । ते तुझी नारी श्रीरामा ॥६१॥ त्रेतायुगीं विदेहाघरीं । अजन्में जन्मोनि सुंदरी । राक्षसां मारील पूर्ववैरेंकरीं । जाण निर्धारीं श्रीरामा ॥६२॥ हे जानकीची उत्पत्ती । बोलिला वाल्मीक महामती । हेचि कथा आणिके ग्रंथीं । विपरीतार्थें पैं असे ॥६३॥ जयानें जैसे देखिलें । तयानें तेंचि निरूपिलें । आपण अवधारिजे भाववळें । कल्मपावेगळें[3] वहावया ॥६५॥ एका जनार्दना शरण । म्हणतां गेलें एकपण । एका आणि जनार्दन । नामें भिन्न स्वरूप एक ॥६५॥ जनार्दन तोचि एक । एक तोचि होय व्यापक । व्यापकत्वें पाहतां एक । एकाहूनि देख दुसरें नाहीं ॥६६॥ यालागीं एका आणि जनार्दन । मुळींच पाहतां अभिन्न जाण । म्हणोनियां नांवें अनन्य शरण । संतसज्ञान पैं होती ॥६७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां वेदवत्याख्यानं नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥ ओंव्या ॥६७॥

## अध्याय अठरावा

॥ श्रीजगद्गुरवे नमः ॥

### रावणाचे राजा मरुत्ताच्या यज्ञाला जाणे

मरुत्त राजाच्या यज्ञाला रावणाचे आगमन : वेदवतीचें अग्निप्रवेशन । तें देखोनि दशानन । पुष्पकीं आरूढोनि पर्यटन । करिता झाला मेदिनीतें ॥१॥ तदनंतरें मरुत्त भूपती । यज्ञ करीत होता उशीरपर्वतीं । मिळाले ऋषि देवपंक्तीं । मंत्राहुती घालीत होते ॥२॥ देवगुरूचा बंधु जाण । संवर्तनामें तो ब्राह्मण । जयाचें ज्ञान बृहस्पतिसमान । आचार्य पूर्ण यज्ञींचा ॥३॥ समस्त द्विजांसहित । होम करी राजा मरुत्त । तंव रावण देखिला येत । वरदोन्मत्त होवोनी ॥४॥

---

**शब्दार्थ** - १. शुक्र व शोणित यांपासून न झालेली, २. अग्नीमध्ये, ३. पापविमुक्त.

वरदानाचेंनि बळें । त्रैलोक्य जिंतीत चालिला सकळें । तें देखोनि द्विजदेवकुळें । अत्यंत भय पावलीं ॥५॥

रावणभयाने देवांनी निराळ्या योनींत प्रवेश केला : तदनंतरें श्रीरघुपती । देव आणिक योनी प्रवेशती । ते कोण कोण जन्म धरिती । ते श्लोकार्थी सांगेन ॥६॥

इंद्रो मयूरः संवृत्तो धर्मराजस्तु वायसः । कृकलासो धनाध्यक्षो हंसो वै वरुणोऽभवत् ॥१॥

शचीपति झाला मयूर । धर्मराज[1]वायसशरीर[2]। कृकलास होवोनि कुबेर । हंसरूप वरुण झाला ॥७॥ राक्षसभयेंकरून । देवीं वेष पालटोन । भयेकरीं राहिलें लपोन । तंव रावण काय करी ॥८॥

रावणाचे मरुत्ताला युद्धाचे आव्हान : रावण म्हणे रायासी । तूं युद्ध करीं आम्हांसी । नाहीं तरी हारविलें ऐसे वचनासी । उच्चारोनि बोलिजे ॥९॥ देखोनि रावणाची स्थिती । मग तो मरुत्त भूपती । कोण म्हणोनि रावणाप्रती । अट्टहासें पुसता झाला ॥१०॥ अट्टहासें गंभीर वचन । ऐकोनि संतोषला रावण । म्हणे तुवां केले गिरागर्जन । तेणें संतुष्ट मन झालें ॥११॥ तूं कोणाचा कोठील कोण । येथें यावया काय कारण । आम्हांसी वांछितोसी रण । तेणें संतुष्ट मन झालें ॥१२॥ राया मी झालों सुप्रसन्न । मज कोण म्हणसी तरी ऐक सावधान । माझा ज्येष्ठ बंधु वैश्रवण । नाम रावण प्रसिद्ध माझें ॥१३॥ माझेनि धाकें जाण । सुरासुर कंपायमान । देव दांतीं धरिती तृण । मानी कोण मजपुढें ॥१४॥ आपुलेनि सामर्थ्येंकरून । म्यां रणीं जिंतला वैश्रवण । घेवोनि पुष्पक हिरोन । विराजमान विचरतसें ॥१५॥

रावणाची गर्वोक्ती ऐकून मरुत्ताने त्याचा धिक्कार केला : ऐकोनि रावणाचें वचन । मग तो मरुत्त इक्ष्वाकुनंदन[4]। रावणाप्रति काय वचन । निर्भर्त्सून बोलतसे ॥१६॥ धन्य धन्य तूं दशानना । तुजसारिखा योद्धा या त्रिभुवना- । माजि पाहां बंधूतें रणा । आणिला ऐसा न देखिला ॥१७॥ या त्रिभुवनामाझारीं । ज्येष्ठ बंधु पितयासरी । त्यातें जिंतोनि संपत्ति हरी । ऐसा नाहीं देखिला ॥१८॥ बंधु बंधूनें जिंतिले । ऐसें नाहीं पुराणीं ऐकिलें । तें तुवां साच केलें । रणीं पाडिलें अग्रजातें ॥१९॥ इतुक्या करोनि अधर्मा । पुढती श्लाघतोसि[5] अधर्मा । तुजपरता पापात्मा । आणिक आम्हां दिसेना ॥२०॥ पूर्वी योद्धे अनेक । झाले ते ऐकिले सकळिक । बंधूस जिंतिलें हें तुझेनि मुखें । आजि आपण ऐकिलें ॥२१॥ इतुकें वदोनि भूपती । चाप घेतलें अति निगुतीं । बाण लाविलासे सिती[6] । संग्रामाप्रती निघाला ॥२२॥

मरुत्ताची रावणाशी युद्ध करण्याची तयारी पाहून संवर्ताकडून प्रतिबंध : मरुत्त जातां संग्रामासीं संवर्त बोले मारुत्तासी । म्हणे राया रणभूमीसीं । अधिकार नाहीं जावया ॥२३॥ धर्मकार्य अवलंबून । त्यासि सांडोनि करिसी रण । तरी सर्वथा नसे जयो जाण । सत्य वचन हें माझें ॥२४॥ घरीं माहेश्वरयज्ञ । अवलंबिल्या करावा पूर्ण । पूर्णाहुति न होतां निंद्य रण । ऐसें जाणोन नवजावें ॥२५॥ यज्ञीं न होतां पूर्णाहुती। सांडोनि गृहस्थ विमुख होती । तयांच्या वंशा होय शांती । जाण नृपती मरुत्ता ॥२६॥

दीक्षितस्य कुतो युद्धं क्रूरत्व दीक्षिते कुतः । संशयश्च रणे नित्यं राक्षसश्चैव दुर्जयः ॥२॥

गुरुपदेशामुळे युद्धापासून मरुत्त परावृत्त झालेला पाहून राक्षसांकडून यज्ञीय ब्राह्मणांचा संहार : दीक्षितासी युद्ध कोणीकडे । दीक्षितासी क्रूरत्व कोठें घडे । दीक्षितें मन होमाकडे । निजनिवाडें लावावें ॥२७॥ दीक्षितें उठोनि प्रातःकाळीं । स्नानसंध्या सारोनि कुंडाजवळी । बैसावें मग

शब्दार्थ – १. यमराज, २. कावळा, ३. सरडा, ४. इक्ष्वाकुपुत्र, ५. प्रौढी मिरवतोस, ६. दोरीवर.

मंत्रमेळीं । अग्नि तृप्त करावा ॥२८॥ ऐकोनि गुरूचे वचन । राजा सांडी धनुष्यबाण । अग्नीपासीं येवोनि आपण । सावधान बैसला ॥२९॥ तें देखोनि लंकानाथ । जिंतिलें म्हणोनि आनंदत । शुकसारणादि प्रधान समस्त । अवघे म्हणत जयो स्वामी ॥३०॥ जिंतिलें म्हणोनि गर्जन । करिते झाले राक्षसगण । आपुले ठायीं श्लाघोन । उल्लास जाण पावले ॥३१॥ यज्ञीं होते ब्राह्मण । तयांतें राक्षसीं भक्षून । तेथें आनेआन[1] करून । तृप्त होवोन चालिले ॥३२॥ होते[2] पोते[2] उद्गाते । आचार्य ब्रह्मा भक्षिलें त्यातें । रक्त पिवोनि खाती मांसातें । निशाचर तृप्तीतें पावले ॥३३॥

रावण निघून गेलेला पाहून देवांनी आपले मूळचे रूप धारण केले : रजिपातें जिंतोन। जयो पावला दशानन । मग पुष्पकीं आरूढोन । अवनिपर्यटन करिता झाला ॥३४॥ रावण गेला देखोन । इंद्रादिक देवगण । निजरूप धरिते झाले जाण । सावधान अवधारा ॥३५॥ अमरेंद्र निजरूप धरोन । मयूराप्रति बोले वचन । म्हणे मी झालों सुप्रसन्न । वरदान तुज देतों ॥३६॥

इंद्राकडून मोराला वरदान : हे माझे सहस्र नेत्र । ते तुझे पांखीं भासती निश्चित । ते तुज दिधले स्वतंत्र । अगा भुजगारे[3] विहंगमा॥३७॥ माझे नेत्र सहस्रवरी । तुढे बर्हे[4] होती निर्धारीं । आणि मी वर्षेन जळधारीं । तुज आनंद भारी होईल ॥३८॥ पूर्वी मयूराचे पांख[5] नीळवर्ण । त्यावरी इंद्राचें वरदान। नीळवर्णी विचित्र पूर्ण। रंग जाण भासला ॥३९॥ तदनंतरें श्रीरघुपति । वरुण वदे हंसाप्रति । अगा ये पक्षिराजा धर्ममूर्ति । प्रसन्न झालों मी येथें ॥४०॥

वरुणाचे हंसाला वरदान : वरुण म्हणे हंसासि जाण । तुझें गंगातीरी क्रीडण । तुझें शरीर तोयासमान । अंगीं प्रभा पूर्ण भासेल ॥४१॥ ऐक माझी प्रसन्नता। पत्ररथ[6] हंसनाथा । तुझा वर्ण मनोहर सौम्यता । शशीसारिखा निर्मळ ॥४२॥ जैसा व्योमीं समीरण । विचरतसे स्वेच्छेंकरून । तैसें तुझे उड्डानें गगन । शोभा गहन पावेल ॥४३॥ माझिया देहासमान । प्रभा होईल तोयचरा पूर्ण । जें जें ईप्सितें[7] तुझें मन । ते मनोरथ जाण पावसी ॥४४॥ उदका तुज अति प्रीती । होईल विहंगमा[8] निश्चितीं । प्रीतीचें लक्षण ज्ञाते जाणती । प्रीतीनें प्रीती वाढतसे ॥४५॥ हंसा पूर्वी श्रीरघुनाथा । पांढरा वर्ण सर्व नव्हता । पक्षीं नीळा अग्रीं श्वेतता । कटिबंधअग्र पांढरें ॥४६॥ मुनि म्हणे श्रीरघुनाथा । ऐक श्रावणारिसुता । वैश्रवण कृकलास वर देतां । प्रत्युत्तरीं पैं वदला ॥४७॥

कुबेराचे कृकलासाला वरदान : कुबेर म्हणे कृकलासाप्रती । प्रसन्न झालों जाण निश्चितीं । तुझें शरीर सुवर्णकांती । मी संतोषोन तुज देतों ॥४८॥ आणिक कृकलासा ऐक । तुझे मस्तकीं शिखा देख । होईल जाण निःशेख । किंचित श्यामता शरीरीं ॥४९॥ तदनंतरें धरणिजापती। यमराज हर्षानंदें चित्तीं । कागाप्रति[9] वदे वरदोक्ती । सुनिश्चितीं अवधारा ॥५०॥

यमाकडून कावळ्याला वरदान : यम म्हणे कागासी । तुज मी प्रसन्न निश्चयेंसीं । प्रीतीनें ऐक माझिया वचनासी। सावधान होवोनी ॥५१॥ दशाहाचा[10] पिंड जाण। जे नर देती तुजलागोन। तयांसि होय स्वर्गगमन । अन्यथा जाण पैं नव्हे ॥५२॥ जे नर मरण पावती । त्यांचें दहा दिवसांचे अंतीं । बळिप्रदान तुज देती । ते पावती स्वर्गासी ॥५३॥ आणिक तुज वरदान । देतो मी धर्मराज आपण । तुज होईल अमरपण । अमरत्वाचें लक्षण अवधारीं ॥५४॥ शरीरीं

---

**शब्दार्थ** - १. अनन्वित कृत्य, २. ऋत्विजविशेष, ३. मयूरा, ४. पिसारा, ५. पंख, ६. हे पक्ष्या, ७. इच्छितें, ८. पक्ष्या, ९. कावळ्याला, १०. दहाव्या दिवसाचा.

पीडा उपजोन । अनेक मरती प्राणिजन । तैसे तुज नाहीं जाण । देहआरोग्य सदा तुझें ॥५५॥ परहस्तें तुज मरण । होईल हें सत्य जाण । स्वइच्छेनें तुज मरण । नाहीं जाण पक्षिराजा ॥५६॥

एवं दत्वा वरांस्तेभ्यस्तस्मिन्यज्ञाश्रमे सुराः । निवृत्ते यज्ञसमये पुनः स्वविषयं गतः ॥३॥

यज्ञसमाप्तीनंतर देव आपापल्या लोकाला गेले : ऐसा वर देवोनि तयांतें । यज्ञाश्रमीं सुर जे होते । यज्ञसमाप्ति करोनि स्वकार्यातें । जाते झाले देवगण ॥५७॥ ते म्हणाल कोण कोण । तयांचीं नांवें मी सांगेन । इंद्र यम कुबेर वरुण । हे मुख्य जाण चवघेही ॥५८॥ रावणाच्या भयेंकरीं । रूपें पालटलीं होतीं सुरीं । ते निजरूप धरोनि निर्धारीं । आपुलालिया लोका पैं गेले ॥५९॥ एका जनार्दना शरण । मी नेणें मूळींचें निरूपण । नेणे श्लोकपद अन्वय जाण । शास्त्रव्याख्यान मी नेणें ॥६०॥ मी नेणें कळाकुसरी । मी नेणें साहित्याची भरोभरी । नेणें सुगंधचातुरी । एका जनार्दनावाचूनी ॥६१॥ नेणें श्लोकींचा श्लोकार्थ । नेणें नवरस कासिया म्हणत । नेणें प्रबंधरचना येथ । एका जनार्दनावांचूनी ॥६२॥ मी संतांचे लळिवाड । संत माझें पुरविती कोड । संतांवांचूनि भव[१] अवघड । कोणाचेनि निवारे ॥६३॥ एका जनार्दना शरण । पुढें गोड निरूपण । पृथ्वीजयो पावेल दशानन । श्रोतीं सावधान ऐकिजे ॥६४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां मरुत्तयज्ञगमनं नाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥ ओंव्या ॥६४॥ श्लोक ॥३॥ एवं ॥६७॥

## अध्याय एकोणिसावा

॥ श्रीआत्मारामाय नमः ॥

### अनरण्य स्वर्गात गेला

पृथ्वीवरील अनेक राजांकडून अजिंक्यपत्रे स्वीकारीत रावण विजयोन्मादाने अयोध्येस आला : मागील प्रसंग संपतेअंतीं । मरुत्ताते जिंकोन लंकापती । पुढें येतां अनेक भूपती । पृथ्वीचे जिंतित । ॥१॥ दुष्टात्मा तो रावण । जिंतित निघाला आपण । इंद्रासारिखी जयांची आंगवण । तयां रायांप्रति येता झाला ॥२॥ रावण क्रोधें म्हणे तयांसी । मी मागतों संग्रामासी । जरी बळ असेल तुम्हांसी । तरी युद्धासी पैं यावें ॥३॥ नाहीं तरी पराभविलें म्हणोन । वदावें मजप्रति वचन । वृथा बोलाल गा झणें । सुटका नाहीं तुम्हांसी ॥४॥ लंकेश्वराचें ऐकोनि वचन । राजे मनांत जाणोन । म्हणती यासी सदाशिव प्रसन्न । दिधलें वरदान जिंतवे ना ॥५॥ ऐसा करोनि विचार । मग बोलते झाले नृपवर । ते कोण कोण तरी साचार । रोतीं सादर परिसावें ॥६॥ नामें सागतां अपार । कथा वाढेल विस्तार । म्हणोनि संकळित[२] नृपवर । ऐका सादर सांगेन ॥७॥ दुष्कृत आणि सुरथ । तिसरा गाधी चवथा जय तेथ । पांचवा पुरुरवा निश्चित । इतुके रघुनाथा बोलते झाले ॥८॥ हे सर्वही मिळोन । रावणाप्रति मधुर वचनें । म्हणती आम्ही अशक्त दीन । तुजसमान नाहीं योद्धा ॥९॥ ऐकोनि तयांच्या वचनासी । रावण संतोषोनि मानसीं । म्हणे आपणासमान पृथ्वीसीं । योद्धा नाहीं निश्चित ॥१०॥ ऐसें जाणोनि दशानन । पुष्पकीं आरूढोनि पर्यटन । करिता झाला तंव अयोध्याभवन । दूरोनियां देखिलें ॥११॥

---

शब्दार्थ - १. संसार, २. थोडक्यात.

वैभवशाली अयोध्येचे वर्णन : सुवर्णकळसांचिया हारी[1] । तेणें शोभली अयोध्यानगरी । रत्नदीप घरोघरीं । उत्तम मध्यम पुरुषांचें ॥१२॥ अयोध्येमाजी घरें । तिखणीं पांचखणी निर्धारें । दुखणी सहस्र प्रकारें । पाहतां पाहतां नयनीं दिसेना ॥१३॥ हाटवटिया चौबारें । तोरणें नवरत्नांचीं मंदिरें । दोहीं भागीं चांदवे[2] विचित्राकारें । नाना चित्रें त्यांमाजी ॥१४॥ घरोघरीं वेदपठन । ब्राह्मण करिती अग्निहोत्र यज्ञ । कोणासि नाहीं दुःखदैन्य । स्वानंदें पूर्ण विचरती ॥१५॥ ऐसिये अयोध्येप्रती । देखा झाला लंकाप्रती । वनश्री जैसी इंद्राची अमरावती । त्याहूनि अधिक गती इयेची ॥१६॥ ऐसिये अयोध्येप्रति जाण । राज्य करी पुरुषपंचानन[3] । बळें शक्र किंचित न्यून । त्याहूनियां अधिक पैं ॥१७॥

अयोध्याधिपती अनरण्य राजाला रावणाचे युद्धार्थ आव्हान : याचें नाम अवधारिजे । यासि अनरण्य बोलिजे । तयाप्रति येवोनि विंशतिभुजें[4] । संग्रामातें मागितलें ॥१८॥ तो सूर्यवंशी भूपती । अति उदार अगाधकीर्ती । तयातें म्हणे लंकापती । संग्रामातें मज दीजे ॥१९॥ ऐकोनि रावणाचें वचन । राजा झाला क्रोधायमान । म्हणे रावणा स्थिर मजसीं रण । करावया तूं अशक्त ॥२०॥ तथापि संग्रामाच्या ठायीं । आम्हीं तुम्ही भिडूं उसण्याघायीं । म्हणोनि राजा सैनिकां पाहीं । आज्ञापिता पैं झाला ॥२१॥

अनरण्याचे सैन्य सिद्ध. रावणाने त्या सैन्याचा संहार केला : सैन्य पालाणा रे पालाणा[5] । करा वेगीं सिद्ध सेना । रथ कुंजर अश्व जाणा । क्षणामाजि सज्जिले ॥२२॥ गजदळातें नहीं मिती । घोडे कोण जाणे किती । रथांची संख्या अयुतायुतीं । केली निगुतीं नवजाय ॥२३॥ सैन्य न माय भूमंडळीं । वीर सिंहनादें करिती आरोळी । ऐसे येते झाले रणभूतळीं । ते रावणें देखिले ॥२४॥ सैन्यातें देखिलें । रावणें बाण सोडिले । एक एक मारिले । कोण उरले पैं नाहीं ॥२५॥ जैसें वैश्वानर मुखीं । पडिलें ते सर्वही भक्षी । तैसें अनरण्यसैन्य रावणमुखीं । बाणीं निःशेष निवटिलें ॥२६॥ जैशा नद्या समुद्राप्रती । मिळालिया समुद्र होती । तैसे सैन्य रावणाचे हातीं । सांपडलें तें भंगलें ॥२७॥

अनरण्याचे बाण विफल : सैन्य भंगलें देखोन । अनरण्य कोपायमान । रागें धनुष्या वाहिला गुण । शरसंधान तेणें केलें ॥२८॥ रावणमस्तकावरी बाण । पडतां नव्हेचि पैं भग्न । जैसा पर्वतीं वर्षे पर्जन्य । तैसें संधान पैं झालें ॥२९॥ रावणातें न रुपती शर। छिन्न भिन्न नव्हे शरीर । देखोनि अनरण्य चिंतातुर । म्हणे वरदबळ यासी भय नाही ॥३०॥ तदनंतरें श्रीरघुपती । सावधान करोनि वृत्ती । पुढें काय वर्तलें तुजप्रती । यथानिगुतीं सांगतसें ॥३१॥

रावणाने अनरण्याला घायाळ केले : मग तो राक्षस लंकापती । अनरण्यातें लक्षोनि निगुतीं चडकणा हाणोनियां क्षिती[6] । वरी पाडिला लोळत ॥३२॥ अनरण्य राजा पडिला मेदिनीं । विकळअंग कंपायमान होउनी । जैसा अग्निदग्ध साळ वनीं । उन्मळोनी पडे तैसा ॥३३॥ पडिला ऐकोनि अनरण्य भूपती । हांसोनि लंकेश तयाप्रती । म्हणे तुज काय झाली प्राप्ती । मजसीं युद्ध करितां राया ॥३४॥ स्वर्गमृत्युपाताळीं । युद्ध करी मजसीं ऐसा नाहीं बळी । राया विषयभोगें जीं लुब्धलीं । नेणती माझा पराक्रम ॥३५॥

अनरण्याने वर्णिलेला कालमहिमा : रावणाचें ऐकोनि वचन । बोलता झाला अनरण्य । म्हणे राक्षसा मज कोण अशक्यपण । तुजसीं संग्राम पैं करितां ॥३६॥ परी हा काल विपरीत । तुज यश मज अपेश प्राप्त । मज काळें जिंतिलें येथ । तू निमित्तमात्र झालासी ॥३७॥ मजसारिखे

शब्दार्थ – १. रांगा, २. छतें, ३. नरश्रेष्ठ, ४. रावणाने, ५. सज्ज करा, ६. थप्पड.

राजे रणीं । तुवां जिंतिले रणमेदिनीं । काळसाह्याची ऐसी करणी । काळाधीन प्राणी पैं असे ॥३८॥ काळपाशीं त्रिजगती । बांधिली लंकेशा निश्चितीं । हरि हर ब्रह्मा आणि सुरपती । ते प्रारब्धें वर्तती राक्षसा ॥३९॥

सर्वजण प्रारब्धाधीन आहेत : हरि वृंदेच्या श्मशानीं । बैसता झाला तीलागूनी । सदाशिव जो शूळपाणी । त्याची करणी अवधारीं ॥४०॥ मोहिनीनें मोहिला । लाज सांडोनि पाठीं लागला । सर्वेचि वीर्यातें द्रवला । मोहिनीरूप देखोनि ॥४१॥ महेशासि लिंगपतन[१] । इंद्र भगांकित होऊन । चंद्रातें लांछन झाले जाण । गुरुतल्पगाचें[२] ॥४२॥ प्रारब्ध विधात्याचे गाढें । जन सृजी[३] कोण्या चाडे । पडिलासे तो घडामोडें । थोर कष्ट पावत ॥४३॥ जैसें कुलाल चक्रावरी । एक मोडी एक नवें करी । थापटोनि आकारीं । बरव्यापरी आणितसे ॥४४॥ यालागीं जन प्रारब्धाधीन । प्रारब्ध बळवंत पूर्ण । तयातें घालितो लोटांगण । जेणें व्यसन पावलों ॥४५॥

अनरण्याचे भविष्यकथन व शापवाणी : आतां रावणा अवधारीं । जरी म्यां आधारिला असेल हरी । भगवद्भावें द्विज जरी । पूजोनि भोजन दिधलें असेल ॥४६॥ वापी कूप आराम । श्रीहरिप्रीत्यर्थ दानहोम । जरी केला असेल तरी पुरुषोत्तम । माझे वाक्य सत्य करो ॥४७॥ प्रजापालन बरव्यापरी । गाई ब्राह्मणां दया भारी । केली असेल तरी श्रीहरी । माझिये वंशीं जन्मेल ॥४८॥ श्रीगुरु तो परब्रह्म । ऐसा म्यां केला असेल नेम । तरी माझे वंशीं पुरुषोत्तम । आत्माराम अवतरेल ॥४९॥ म्हणवील इक्ष्वाकुनंदन । तो लंकेशा तुझ्या वधार्थ जाण । अवतरेल श्रीजनार्दन । अयोनिज पूर्ण राघव ॥५०॥ चरणीं उद्धरील शिळा । पर्णील जनकाची बाळा । सोडवील देवां सकळां । तुज वधोनि रावणा ॥५१॥ ऐसें रावणा शापिलें । ऐकोनि स्वर्गी देव आनंदले । दुंदुभिवाद्ये वाजविते झाले । देव पुष्पें वर्षती ॥५२॥ तदनंतरे तो नृपती । देह त्यागोनि स्वर्गाप्रती । जाता झाला मग लंकापती । तेथोनि पुढती निघाला ॥५३॥ एका जनार्दना शरण । रावणा अर्जुना युद्ध दारुण । तेचि कथा परम पावन । सावधान अवधारिजे ॥५४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां अनरण्यनृपस्वर्गगमनं नाम एकोनविंशतितमोऽध्यायः ॥१९॥ ओंव्या ॥५४॥

## अध्याय विसावा

॥ श्रीरघुपतये नमः ॥

### रावणाचे नर्मदातीरावर आगमन

तदनंतरें श्रावणारिनंदन[४] । अगस्तीप्रति कर जोडून । म्हणता झाला स्वामीनें निरूपण । रावणाचें सांगितलें ॥१॥ दशानन विचरत क्षितीं । पृथ्वीचे भूप शरण येती । तयांतें जिंकोनि लंकापती । पुढारां चाले जिंतित ॥२॥ ऐसें जिंतिलें भूमंडळ । राजे जिंतिले ज्यांचा पराक्रम प्रबळ । ऐसा दशानन अति सबळ । कोठे नाहीं पराभविला ॥३॥ निर्वीर होती तैं सृष्टी । ऐसें गमतें माझे पोटीं । यदर्थी आशंका थोर मोठी । माझे जीवीं वाटतसे ॥४॥ बलाढ्य राजे अवनीं नव्हते । ऐसें वाटतें माझेनि मतें । तैं पाशुपतादिक होतीं शस्त्रें । त्याचें कांहीं न चलेचि ॥५॥ ऐसें श्रीरामाचें वचन । ऐकोनियां हास्यवदन । बोलता झाला तूं ब्रह्म पूर्ण । जाणोनि प्रश्न आम्हां करिसी ॥६॥ तूं ये सृष्टीचा कर्ता । तुझा कुमर हा विधाता । मायेस तुझेनि

शब्दार्थ – १. वीर्यपतन, २. गुरुपत्नीगमनाचें, ३. उत्पन्न करी, ४. दशरथाचा पुत्र राम.

प्रबळता । त्रैलोक्यातें मोहावया ॥७॥ तूं ईश्वराचा ईश्वर । तुझा योगियां न कळे पार । तूं स्वलीलेनें हा अवतार । घेतला कार्याकारणें ॥८॥ तो तूं श्रीरामा आम्हांप्रती । कथा पुससी अति निगुती । हें आश्चर्य वाटे आमुचें चित्तीं । कृपामूर्ति कृपाळुवा ॥९॥ आमुचा वाढवोनियां मान । आम्हांसि देतोसि भूषण । तरी तुझिये कृपेनें जाण । पुढील निरूपण सांगतसें ॥१०॥ रावणें अनरण्य भूपती । जितोनि चालिला विचरत क्षितीं । तदनंतरें श्रीरामा नगरी माहिष्मती । अपूर्व पुढें देखिली ॥११॥

सहस्त्रार्जुनाच्या माहिष्मतीनगरीला रावणाचें ससैन्य आगमन : महिष्मतीनामें नगरी । तिची सरी न पवे स्वर्गपुरी । तोरणें पताका घरोघरीं । अति साजिरीं अनुपम्य ॥१२॥ तिये नगरीसमीप । येवोनि पौलस्तिकुळदीप । सर्वे प्रधान ज्यांचा अगणित प्रताप । ऐसें तेथें येते झाले ॥१३॥ रावणें पृथ्वीपति जिंतिले । थोर थोर भूपां दुःख दिधलें । ऐसे करितां पुढे देखिलें । नगर राया अर्जुनाचें ॥१४॥ तया नगरीचा भूपती । प्रतापतेजें अद्भुतकीर्ती । अग्नीसारिखी दिसे दीप्ती । नामें अर्जुन विख्यात ॥१५॥

सहस्त्रार्जुन त्या वेळी स्त्रियांसह नर्मदेवर क्रीडेसाठी गेलेला होता : तो सहस्त्रार्जुन ते दिवशीं । स्त्रियांसहित नर्मदेसीं । गेला असतां जळक्रीडेसीं । मागें रावण पैं आला ॥१६॥ सर्वे प्रधान थोर थोर । ऐसा आला दशशिर । अर्जुनाच्या प्रधानांसी उत्तर । बोलता झाला रावण ॥१७॥ अगा ये मंत्री हो तुमचा नृपती । कोठें आहे तो सांगा निश्चितीं । मी आलों असे त्यासीं युद्धार्थी । वेगीं भूपती पाचारा ॥१८॥ मी लंकेश दशानन । आलों रायासीं युद्धालागून । सांग तयाप्रति त्वरेंकरून । युद्धा रावण पाचारी ॥१९॥

रावणाचे आव्हान ऐकून राजाचे प्रधान भयभीत : ऐकोन राक्षसाचें वचन । प्रधान झाले कंपायमान । म्हणती राक्षसाधिपा जाण । राजा नाहीं नगरीमध्यें ॥२०॥ ऐकोनि नगरवासियांची मात[१] । पुढें चालिला लंकानाथ । तंव देखिला विंध्य पर्वत । अति उन्नत गगनामपम ॥२१॥ सहस्त्र शिखरें पर्वतासीं । सिंह शार्दूळ[२] तया वनप्रदेशीं । सरितातोय[३] गर्जे खळाळेंसीं । तेणें नादें अंबर गर्जे ॥२२॥ देव दानव गंधर्व । किन्नर अप्सरा मानव । आणि ऋषींचे समुदाव । आनंदें स्वयमेव क्रीडा करिती ॥२३॥ जैसे देव अमरावतीं । संतोषें क्रीडा करिती । तैसे त्या विंध्यपर्वतीं । आनंदें वसती सुर सिद्ध ॥२४॥

रावण नर्मदातीरावर आला : उल्कावंत दरीवंत । हिमवंतासमान तो पर्वत । देखोनियां लंकानाथ । नर्मदातीराप्रति आला ॥२५॥ तया पर्वताचे शिरीं । नर्मदा नांवे नदी निर्धारीं । जिचेनि दर्शनें पातका उरी[४] । नुरे ऐसा जिचा महिमा ॥२६॥ तिये नर्मदेच्या दक्षिणभागीं सागर । जजो सकळ नदींचा ईश्वर । तयाप्रति ते चतुर । हर्षे निर्भर मीनली पैं ॥२७॥

नर्मदा नदीचे वर्णन : तिये रेवेचिया तीरीं । आनंदें पक्षी नानापरी । वसती तेणें साजिरी । वनस्थळीं शोभत ॥२८॥ रानगाई सिंह शार्दूळ । उन्मत्त गज विशाळ । म्हैसे उष्ट्र[५] व्याघ्र सायाळ । प्राशावया जळ वास तीरीं ॥२९॥ मृगमृगींचें थवे । चितळे इत्यादिक सेवोनि रेवे । आणिक श्वापदें तीर बरवें । वनफळें सेवोनि वसताती ॥३०॥ चक्रवाकें हंस अनेक । तळकुक्कुट सारसमयूरादिक । कोकिळा कूजती तेणें तटाक । अति रमणीय शोभलें ॥३१॥ नानापरींच्या वृक्षयाती । अनेक प्रकारच्या कुसुमजाती । भ्रमरसंघ रुणझुण करिती । पांथिकां

---

शब्दार्थ - १. हकीकत, २. वाघ, ३. नद्यांचे उदक, ४. ठाव, ठिकाणा, ५. उंट.

विश्रांती व्हावया ॥३२॥ शनैः शनैः मलयानिळ । तेणें मार्गस्थां सुखकल्लोळ । घालिती आनंदाचा गोंधळ । सुखी सकळ म्हणोनी ॥३३॥ तदनंतरें तिये तीरीं । नर्मदा अक्षोभ अमूप वारी । शोभती झाली ते अवधारीं । श्रीरामचंद्रा दयाळुवा ॥३४॥ कुमुदें विकासलीं सुमनीं । तेचि माथां शोभे वेणी । चक्रवाकें कुच दोनी । वनिता म्हणोनी वर्णिजे ॥३५॥ विस्तीर्ण वाळुवंट सुंदर । तोचि माज[1] सुकुमार । हंसावळी मेखळा साचार । लहरी तें मुक्ताफळ शोभे नाकीं ॥३६॥ पुष्पें तीरींची ते चंदनउटी । कुमुदें तेचि शोभे थटी । जळप्रवाह त्वचा गोमटी । उत्पल जें तेंचि नयन ॥३७॥ तीर अत्यंत विशाळ । माजि मीन मगरांचा[2] उल्हाळ । तेचि गळां मुक्तामाळ । सुंदर वेल्हाळ शोभली ॥३८॥ ऐसें देखोनि नर्मदारत्न । पुष्पकींहून उतरला दशानन । करावया अवगाहन । तिये ठायीं ते काळीं ॥३९॥ त्या नर्मदेच्या रम्यतीरीं । रम्य पुष्पवाटिका साजिरी । मंत्रियांसहित वैश्रवणारी[3] । सुखं तेथें बैसला ॥४०॥ उदक भरोनि हेमपात्रीं[4] । करचरण प्रक्षाळी भूपती । आचमन करोनि मस्तकीं गात्रीं । शिंपी पुण्य तोय म्हणोनी ॥४१॥

रावणाचे स्वमहिमान व नर्मदेचे महत्त्व : लाहोनि नर्मदादर्शन । संतोषला दशानन । शुकसारणांप्रति मधुर वचन । बोलता झाला ते काळीं ॥४२॥ रावण म्हणे सुरारि हो । ज्याचा अरि केतुराहो । तो मध्यान्हीं आला पहा हो । मद्भयें शीतळ किरणें केलीं ॥४३॥ ज्याचे सहस्र रश्मींकरून[5] । जग धवळिलें दिसे कांचन । तीक्ष्ण उष्णें तपतसे भान । मध्यान्हकाळीं विश्व पीडी ॥४४॥ तो सूर्य माझेनि भयेसीं । शशीसारिखे शीतळतेसीं । तपता झाला आजींच्या दिवसीं । त्यावरी नर्मदासुगंधोदकें ॥४५॥ श्रमहरिता अनिळु[6] । तोही वाहतो हळुहळु । विशेष हें नर्मदाजळु । मद्भयें शीतळे पैं झालें ॥४६॥ जैसी योषिता[7] लावण्यकरीं । अवयव आच्छादी सलज्ज भारी । तैसी ही नर्मदा नारी । मीन लहरीनें झांकितसे ॥४७॥ रावण म्हणे मंत्रिया-प्रती । वैरियांचे शस्त्रास्त्रीं । रुधिरोक्षित[8] सर्व गात्रीं । रायांसी युद्ध करितां हो ॥४८॥ जैसें अहिप्रियलेपन[9] । सर्वांगी लाविती सभाग्य जन । तैसी तुमची वपु शोणितेंकरून । अत्यंत आरक्त पैं झाली ॥४९॥

रावणाचा प्रधानादिकांना नर्मदास्नानाचा आदेश : ते तुम्ही सर्व प्रधान । करा नर्मदेचें स्नान । तेणें व्हाल पुण्यपावन । दोष दारुण नासती ॥५०॥ जैसी दंडकारण्यीं गोदावरी । प्राणिमात्रातें पुनीत करी । तैसी ही नर्मदा स्नानानें उद्धरी । तापत्रयापासूनी ॥५१॥ पाहतां गंगा भरत-खंडीं । प्राणियांच्या दोषां दंडी । तैसे तुम्ही मुंडमुंडी । मज्जनें पापावेगळें होइजे ॥५२॥ आणीक तुम्ही सकळ जन । पुष्पें आणा रे संपूर्ण । येथें पूजूं उमारमण[10] । सुख संपन्न भोगावया ॥५३॥ प्रेमसिंधु गिरिजापती । पूजिलिया होय भुक्ति मुक्ती । तयाचे पूजेलागीं पुष्पयाती । आणावी तुम्ही सकळिकीं ॥५४॥ ऐकोनि रावणाचें वचन । समस्त प्रधान मिळोन । ते कोण कोण म्हणाल नामाभिधान । सावधान अवधारीं ॥५५॥ शुक सारण महोदर । धूम्राक्ष प्रहस्त अंकपन वीर । आणीकही थोर थोर । अनेक नामें तयांची ॥५६॥

सर्वांनी स्नान करून शिवपूजेसाठी रावणाला फुले आणून दिली : उतरोनि नदीभीतरीं । स्नान करितां महावीरीं । उदक चढे दोहीं तीरीं । पूर आल्यासारखें ॥५७॥ उन्मत्त गज रिघोनि जळीं । बुडे फिरे दे आरोळी । तैसे राक्षस मिळोनि सकळीं । जळक्रीडा पैं केली ॥५८॥ समस्त राक्षस मिळोन । करिते झाले नर्मदास्नान । सवेंचि नाना जातींची पुष्पें तोडून । अचळ[11]

---

शब्दार्थ – १. कंबर, २. सुसरींचा, ३. रावण, ४. सोन्याचें पात्रांत, ५. किरणांनी, ६. वारा, ७. स्त्री, ८. रक्तबंबाळ, ९. चंदनाची उटी, १०. शंकर, ११. पर्वत.

केला तयांचा ॥५९॥ पुष्पें देखोनियां दृष्टीं । रावणा हर्ष न माये पोटीं । स्नान करोनि उठाउठीं । विध्युक्त संध्या सारिली ॥६०॥ पितृतर्पण ब्रह्मयज्ञ । जप होम अनुष्ठान । तदनंतर हात जोडून । प्रधानां म्हणे गायन करा ॥६१॥ रावणाची ऐकोनि विनंती । प्रधान सुस्वरें गायन करिती । एक टाळ मृदंग वाहती । एक धरिती सुरातें ॥६२॥ एक नृत्य पैं करित । एक थैथैकार दावित । एक वीणा वाजवित । एक आळवित उपराग ॥६३॥ जेथें नामाचा उच्चार । तेथें सदाशिव निरंतर । ऐसें जणोनि राक्षसेश्वर । पूजा करावया बैसला ॥६४॥

रावणाची शिवपूजा : सुवर्णमय रत्नजडित । शिवलिंगातें वागवित । पृथ्वी विचरतां लंकानाथ । असे सतत लिंग सवें[1] ॥६५॥ तया नर्मदेचिया तीरीं । शिवपूजेचा आरंभ करी । बिल्वदळांचिया राशि थोरी । पूजेलागीं आणिल्या ॥६६॥ कुसुमांचा झाला पर्वत । सुवर्णपात्रीं पंचामृत । मधाच्या कावडी भरोनि तेथ । संख्येरहित जळकुंभ ॥६७॥ क्षीरकुंभां नाहीं मिती । धूप दीप पंचारती । नानापरींच्या आरत्या नेणों किती । वाद्यें वाजती विचित्र ॥६८॥ श्वेत पीत आरक्त । नानापरींचीं वस्त्रें पूजार्थ । नामें शिवाचीं अष्टोत्तरशत । घेता झाला रावण ॥६९॥ अभिषेकपात्र धरोनि करीं । स्तवन करिता झाला सुरारी । पंचामृत घालोनि वरी । पूर्णाभिषेक पैं केला ॥७०॥ तदनंतर लंकापती । वस्त्रें अर्पोन शीघ्रगती । वाळुवंटींच्या वेदिकेप्रती । लिंगस्थापना पैं केली ॥७१॥ भोळा पार्वतीरमण । झालासे भक्ताधीन । जो मनोभावें करील पूजन । त्यासि सर्वस्व देतसे ॥७२॥ जे अर्चिती महेशातें । ते पावती सकळ कल्याणातें । जे अवगणितील शिवातें । मृत्यु त्यातें सोडीना ॥७३॥ ज्ञानी पंडित बुध जन । विधियुक्त करिती कर्माचरण । रावण महामूढधी जाण । विधिविधान पैं नेणे ॥७४॥ वाळुवंटींच्या ओट्यावरी । तेथें स्थापिला त्रिपुरारी । करी घेवोनि सर्व सामग्री । सदाशिवासी वाहिली ॥७५॥ तदनंतर दशशिर । पूजोनियां चंद्रशेखर । मग साष्टांगीं नमस्कार । भुजा पसरोनि घातला ॥७६॥ पुढिले प्रसंगीं श्रीरघुपती । रावणा अर्जुना युद्धप्राप्ती । होईल ते कथा सावध श्रोतीं । श्रवणद्वारें ऐकिजे ॥७७॥ एका जनार्दना शरण । रावणा सहस्रार्जुना युद्ध दारुण । बोलिला वाल्मीक ऋषि सुजाण । सावधान अवधारिजे ॥७८॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणरेवातीरगमनं नाम विंशतितमोऽध्यायः ॥२०॥ ओंव्या ॥७८॥

# अध्याय एकविसावा

॥ श्रीवक्रतुंडाय नमः ॥

## सहस्रार्जुनाने रावणाला बांधून नेले

रम्य नर्मदेचिया तीरीं । राक्षसेंद्र पंचद्वयशिरी । पुष्पोपहारें अर्चिता त्रिपुरारी । काय तेथें वर्तलें ॥१॥ येरीकडे सहस्रार्जुन भूपाळ । माहिष्मतीचा नृपशार्दूळ[२] । श्रीरेवेमाजि स्त्रियांसहित केवळ । क्रीडा जळीं करीत होता ॥२॥ स्त्रियांसहित अर्जुन । क्रीडतसे आंनदें पूर्ण । सहस्र-हस्तिनींसीं एकला जाण । ऐरावती खेळे जैसा ॥३॥

सहस्रार्जुनाने क्रीडेच्या वेळी आपल्या बाहूंनी नर्मदा अडविल्यामुळे तिचे पाणी सर्वत्र पसरून रावणाची शिवपूजा मोडली : जाणावया भुजबळाची थोरी । स्वभुजा पसरोनि भीतरीं । अवरोधूनि रेवा

---

शब्दार्थ - १. बरोबर, २. राजश्रेष्ठ.

तीरीं । स्तब्धता झाली ते काळीं ॥४॥ सहस्रबाहूंच्या बळीं । नर्मदा रोधन झालें । समुद्रासारिखी ते काळीं । चढती झाली उदकेसीं ॥५॥ देखोनियां आत्मजातें[1]। उदधीसि दाटे भरितें । जाणोनि अर्जुनाचे विक्रमातें । नर्मदा तेथें वाढली ॥६॥ कार्तवीर्यभुजींकरोन । सेतूसारिखें दिसे जीवन । अवलोकितां दिशांचे भान । अणुप्रमाण लक्षेना ॥७॥ वैश्रवणारि पूजा करीत होता । तयासि वाटली अपूर्वता । म्हणे अवकाळीं सरिता । माधव नसतां दाटली ॥८॥ होते पूजचें संभार । वाहों लागले दाटलें नीर । तेणें गजबजिला लंकेश्वर । म्हणे विघ्न थोर ओढविलें ॥९॥ मीन नक्र मगर दुर्धर । आणीकही जळचरें अपार । दाटलीं तेणें दशशिर । कासावीस पैं झाला ॥१०॥ नाकीं तोंडीं भरलें पाणी । प्रधान गजबजिले देखोनी । म्हणती समुद्र मर्यादा टाकूनी । आजिंचे दिनीं वाढला ॥११॥ विसर्जून शिवपूजेतें । नित्यनेम कैंचा तेथें । हृदयीं दाटलें भयाचें भरतें । कांही त्यातें स्मरेना ॥१२॥ जेंवि रुसली योषिता पतीसी । अवरोध करी गृहकृत्यासी । तैसें झालें रावणासी । चहूंकडेसी पाहतसे ॥१३॥ तंव देखें जैसा सागर । तैसें दाटलें नर्मदानीर । रावण प्रधानांप्रति सत्वर । बोलता झाला ते समयीं ॥१४॥ नर्मदेचा उगम पूर्वेहून । तेथें वर्षला नाहीं घन । पाणी चढलें पश्चिमेकडून । काय कारण पहावें ॥१५॥ ऐकोनि रावणाची गोष्टी । प्रधानीं आकाशीं उठाउठीं । अर्ध योजनें क्रमूनि सृष्टी । पुढें आश्चर्य दृष्टीं देखिलें ॥१६॥

**प्रधानांकडून रावणाला सहस्रार्जुनाची माहिती :** कोणी एक पुरुषपंचानन । क्रीडे स्त्रियांसह-वर्तमान । सहस्रभुजाचें बळेंकरून । नदी तेणें अवरोधिली ॥१७॥ साळईच्या वृक्षासमान । अंगकांति तैसा जाण । पर्वतमाथां शिखर पूर्ण । स्कंधावरी शिर तैसें शोभे ॥१८॥ नेत्र अग्नीसारिखे आरक्त । मुखीं जिव्हा ळळलळित । उदकीं सहस्र पसरोनि हात । ओघ कोंडिला भुजबळें ॥१९॥ ऐसें देखोनि शुकसारण । रावणाप्रति बोलती वचन । म्हणे राया अपूर्व कथन । सांगता आश्चर्य वाटतें ॥२०॥ साळईच्या वृक्षासमान । कोणी एक पुरुष बळवान । पिंगट केस आरक्त नयन । जिव्हा जाण विद्युल्लतासी ॥२१॥ समवेत योषितासि नाहीं मिती । त्यांसह क्रीडतो जळाप्रती । हस्तिनींमध्ये जैसा हस्ती । तैसा नृपती खेळतसे ॥२२॥ सहस्रभुजांचा भूपती । तेणें अवरोधली नदी निश्चितीं । ऐसें ऐकोनि मंदोदरीपती । क्रोध चित्तीं उद्भवला ॥२३॥

**रावण युद्धार्थ ससैन्य निघाला :** ऐकोनि प्रधानमुखींचें वचन । क्रोधें खवळला रावण । म्हणे न लागतां अर्ध क्षण । निर्दळीन अर्जुनातें ॥२४॥ इतकें बोलोनि लंकापती । सवें प्रधान शस्त्रें हातीं । संग्रामोत्कंठा धरोनि चित्ती । प्रयाण करिती लवलाहें ॥२५॥ ते समयीं अर्जुनासन्मुख । प्रयाण करी दशमुख । राक्षस देते झाले हाक । जैसे मेघ गर्जत अंबरीं ॥२६॥ महोदर शुक सारण । महापार्श्व धूम्राक्ष जाण । परिवेष्टित पौलस्तिनंदन[2]। जेथ अर्जुन तेथें आले ॥२७॥ अति शीघ्र तये काळीं । राक्षसेंद्र महाबळी । येता झाला अर्जुनाजवळी । जो भयानक डोहीं क्रीडतसे ॥२८॥ जिया डोहींचें शाश्वत जीवन । श्यामवर्ण माजि मगर मीन[3]। शोभे तीरीं रम्य वन । फळपुष्प पूर्ण तया ठायीं ॥२९॥ तया डोहाभीतरीं । रावो क्रीडत परिवेष्टित नारी । गीत नृत्य नानापरी । मृदंगझल्लरी रुणझुणिती ॥३०॥ नरेंद्र क्रीडतां ऐसियापरी । तें देखोनि वैश्रवणारी । आरक्तनयन ते अवसरीं । बळें उन्मत्त डुल्लत ॥३१॥ ऐसा तो लंकानाथ । गंभीर वाणीनें गर्जत । कार्तवीर्याचे प्रधानां म्हणत । भय अद्भुत दावोनी ॥३२॥ प्रधान हो

---

शब्दार्थ - १. पुत्राला, २. रावण.

त्वरेंकरून । राय करा जाणवण । युद्धार्थी आलासे रावण । शीघ्र आपण पैं यावें ॥३३॥

अर्जुनाची जलक्रीडा संपेपर्यंत थांबण्याची रावणाला विनंती : ऐकोनि दशग्रीवाचें वचन । अर्जुनप्रधान सन्नद्ध[1] होऊन । म्हणती रावणा अर्थ क्षण । सावधान अवधारीं ॥३४॥ दुश्चित उन्मत्त स्त्रीसीं रत । अथवा मारूं नये निद्रिस्त । ऐशियातें वधिता दोष अद्भुत । स्वर्गी क्षोभत पितृगण ॥३५॥ म्हणती वंशीं झाला दुराचारी । स्वधर्म सांडूनि अधर्म करी । तयासि विमुख त्रिपुरारी । नाना अघोरीं पडेल ॥३६॥ जंव होय सावधान । अर्जुन जळीं क्रीडतां आपण । तंववरी क्षमा करोनि मनें । धैर्य धरोन रहावें ॥३७॥ सावध होईल नृपती । मग तुमची पुरवील मनोवृत्ती । तंवपरियंत लंकापती । स्वस्थ चित्तीं रहावें ॥३८॥

रावणाच्या प्रधानांकडून अर्जुनाच्या मंडळींचा संहार : रावणप्रधानीं काय केलें । रायाच्या प्रधानांसी त्रासिलें । क्षुधित होते तिहीं कित्येक भक्षिले । कित्येक पळाले जीव घेऊनी ॥३९॥ सिंहनाद करिती निशाचर । संग्राम करिते झाले दुर्धर । बाण तोमर आणि वज्र । शूळ दुर्धर टाकिती ॥४०॥ कित्येक रावणें मारिले संग्रामीं । कित्येक पळाले सांडोनि रणभूमी । कित्येक रायापाशीं येऊनी । मात जाणविते जाहले ॥४१॥ समुद्र सांडोनि क्षोभे वेळ । मीनमगरां प्रळयकाळ । तैसे रावणाचे प्रधान सकळ । मिळोनि दळ त्रासिलें आमुचें ॥४२॥ दूतमुखींचें ऐकोनि वचन । कार्तवीर्य कोपायमान । क्रोधें नेत्र आरक्त करून । काय वचन बोलिला ॥४३॥

ते ऐकल्यावर खवळलेला अर्जुन युद्धासाठी निघाला. रावणसैन्याचा विध्वंस : कार्तवीर्य दूतांप्रती । बोले तुम्हीं न भिणें कोणे अर्थी । जळाबाहेर निघाला हस्ती । तैसा राजा चालिला ॥४४॥ क्रोधें नेत्र आरक्त करून । अग्नीसारिखा देदीप्यमान । जैसा कुंडीं हुताशन । तैसा राजा भासला ॥४५॥ धडधडित अग्नि प्रळयकाळीं । संहारीं भूतसृष्टि ज्वालामाळीं । तैसा रावो तये वेळीं । थोर आवेशा पेटला ॥४६॥ वेगीं सुवर्णमय गदा घेऊन । जियेतें कांपे कां भान[2] । सोडिली राक्षसा निर्दळण । करावया ते काळीं ॥४७॥ जैसें रवीच्या प्रकाशीं । अंधकारेंसीं जाय निशी । तैसें रायें राक्षसांसी । गदेकरोनि त्रासिलें ॥४८॥ होतां खगेश्वराचें[3] आगमन । उरग[4] पळती धाकेंकरून । तैसें नृपनाथें राक्षससैन्य । रणांगणीं निवटिलें ॥४९॥ सहस्रार्जुनाचे गदेकरोनी । राक्षस त्रासिले रणमेदिनी । हें प्रहस्त देखोनी नयनीं । मार्ग रोधूनी राहिला ॥५०॥ जैसा विंध्याद्रि वाढे अचळ[5] । तेणें मार्गरोधें न चले भानुमंडळ । तैसें प्रहस्त घेवोनि मुसळ । पर्वतापरी उभा ठेला ॥५१॥

प्रहस्ताच्या पराभवाने इतरांची धांवपळ : तदनंतरें तो भूपति जाण । गदा फिरवोनि दारुण । प्रहस्ताचें मस्तकीं न लागतां क्षण । घाव सुबद्ध हाणिला ॥५२॥ गदाघातें तत्क्षणीं । प्रहस्त पाडिला रणमेदिनीं । देखोनि रावण मनीं । विचारी पुढे काय कीजे ॥५३॥ प्रहस्त रणसागरीं पडिला । देखोनि शुकसारणां पळ सुटला । राक्षसांचा मोड झाला । पुढील कथा अवधारा ॥५४॥

रावण व अर्जुनाचे तुंबळ द्वंद्वयुद्ध : रावणें धनुष्या वाहिला मेढा । उभा राहिला सहस्रार्जुनापुढां । कीर्तवीर्य वीर गाढा । रावणासी युद्धा मिसळला ॥५५॥ एक राक्षसेंद्र एक नृपवर । संग्राम करिती दुर्धर । जैसा प्रळयीं क्षोभे सागर । तैसे वीर मिसळले ॥५६॥ दोघे पर्वतासमान । उन्मत्त दोघे गज जाण । भिडती जयो इच्छून । सावधान पुरुषार्थी ॥५७॥ जैसे दोनी सूर्य आकाशीं । भिडती आपले स्वशक्तीसीं । किंवा दोन अग्नि आपले तेजेंसीं । एकमेकांसी भस्म

शब्दार्थ – १. तयार, २. सूर्य, ३. गरुडाचे, ४. सर्प, ५. पर्वत, ६. दोरी.

करिती ॥५८॥ दोघे मेघांसारिखें करिती गर्जन । पराक्रमे दोघे सिंहचि जाण । दोघे उग्र व्याळांसमान[1] । कार्तवीर्य रावण पैं देखा ॥५९॥ शचीसहित सुरपती । शंकरें घेवोनि पार्वती । सावित्रीसहित प्रजापती । युद्ध पाहती दोघांचें ॥६०॥ गरुडपृष्ठीसीं भगवान । अर्धांगीं अब्धीचें[2] कन्यारत्न[2] । आणीकही सकळ देवगण । युद्ध पाहती दोघांचें ॥६१॥ यक्षगण आणि गंधर्व । विद्याधर उरग मानव । सिद्ध चारण ऋषि सर्व । युद्ध पाहती दोघांचें ॥६२॥ परस्पर गदा हाणिती । एकमेकां निखंदिती । एकमेकांसीं निंदिती । समान शक्ती दोघांची ॥६३॥ एकमेकांवरी गदा टाकित । एकमेकांतें हांसत । एकमेकांतें म्हणत । शस्त्रीं सामर्थ्य पैं नाहीं ॥६४॥ प्रळयमेघ करिती गर्जन । तयांपरी दोघे जण । हाक देतीं तेणें गगन । अत्यंत गर्जनें गर्जत ॥६५॥ सिंहावरी सिंह जैसे । लोटताति बळें आवेशें । तैसे नरराक्षसाधीश। करिते झाले युद्धासी ॥६६॥ काळासारिखे दोघे उग्र । नरपति आणि दशशिर । परस्परें गदामार । करिते झाले शीघ्रवत ॥६७॥ गदा मारितां एकमेकांसीं । तेणें पडसाद उठे आकाशीं । युद्ध करितीं एकमेकांसी । जयो कोणासी पैं नाहीं ॥६८॥ अर्जुनाची गदा सुटली । ते राक्षसा उरीं बैसली । तेणें नाहीं पावला भुली । पराक्रमी राक्षस ॥६९॥ राक्षसाच्या गदाघातें । खेद न होय अर्जुनातें । दोघे समान वीर तेथें । कोणी कोणातें गणी ना ॥७०॥ पूर्वी बळी आणि सुरेंद्रातें । युद्ध झालें आवेशें बहुतें । कोण न पवेचि जयातें । विजय दोघांतें पैं नाहीं ॥७१॥ जैसे वृषभ शृंगेकरीं । भिडताति परस्परीं । गज जैसे दंतकरीं । मारिती एकमेकांतें ॥७२॥ एक राक्षस लंकेश्वर । दुजा तो हैहयाधीश वीर । युद्ध करिती घोरांदर । स्वर्गी सुरवर पाहती ॥७३॥ तंव अर्जुनें काय केलें । हेममय गदेतें मोकलिलें । रावणाचें मस्तक भेदिलें । वरदबळें भुली न पवे ॥७४॥ वज्रापरीस कठिण भारी । लागली रावणाचें शिरीं । गदा चूर्ण होवोनि पृथ्वीवरी । पडोनि शतभग्न जहली ॥७५॥ अर्जनाचे गदेकरून । किंचित विव्हळ झाला दशानन । मागें सरला धनुष्यप्रमाण[3] । तंव नृपराजें जाणीतलें ॥७६॥

**अर्जुनाने रावणाला हजार हातांनी पकडले :** सहस्रभुजांचे बळेंकरीं । अर्जुनें धरिला विबुधारी । जैसा विनतातनयो[4] आपुले वैरी । निजसामर्थ्ये कवळीतसे ॥७७॥ पंचद्वयशतभुज[5] । ऐसा तो हैहयाधिराज[6] । गळां बांधी पौलस्त्यात्मज । जेंवि बळीनें नारायण ॥७८॥ दशग्रीवा गळां बांधोन । स्वर्गीं देखोनि सुरगण । म्हणती भला भला हा अर्जुन । मंगळ शब्द बोलती ॥७९॥ मग करोनि पुष्पवृष्टी । स्वर्गीं देव आनंदकोटी । म्हणती धन्य धन्य हा क्षत्रिय सृष्टीं । क्षात्रधर्मे आगळा ॥८०॥ अर्जुनें रावण कैसा धरिला । जैसा बळीनें विष्णु द्वारपाळ केला । तैसा गळां बांधोनि परतला । आला आपुलिया नगरीसीं ॥८१॥ गर्जना करोनि अर्जुन । रावणातें गळां बांधोन । जैसा पारधियानें श्वान । तैसा दशानन पैं नेला ॥८२॥ प्रहस्त रणीं पडिला होता। तो पावोनि स्वस्थता। चहूंकडे अवलोकी लंकानाथा । तंव अर्जुनें गळां बांधिलासे ॥८३॥

**प्रहस्तादि राक्षसांचा पराभव करून अर्जुन रावणाला आपल्या नगरी घेऊन गेला :** देखोनि रावणा गळबंधन । प्रहस्तादि राक्षस मिळोन । क्रोधें संग्राम दारुण । करिते झाले रायासीं ॥८४॥ म्हणती अर्जुना भूपती । रावण गळां बांधिला हे सुख चितीं । न धरावें जाण युद्धाप्रती । धीर धरोनि रहावें ॥८५॥ राक्षस म्हणती मुसळ साहें । पळों नको उभा राहें । आता तुज कोण

---

शब्दार्थ – १. सर्पासारखे, २. लक्ष्मी, ३. चार हात, ४. विनतापुत्र गरुड, ५. सहस्र भुजा ज्याला जो, ६. हैहय देशाचा राजा.

राखेल माये । वल्गोनियां गर्जती ॥८६॥ तव अर्जुनें काय केलें । रणीं राक्षसां मारिलें । कित्येक ते पळोनि गेले । घायवट होवोनी ॥८७॥ रणीं राक्षसमोड झाला । कार्तवीर्य जयो पावला । देवीं पुष्पवर्षाव केला । भाट गर्जती पवाडे ॥८८॥ मारूनियां दैत्यांसी । इंद्र पावे जयासी । तैसे राजेंद्रें त्या समयासी । राक्षसांतें जिंतिलें ॥८९॥ अर्जुन झाला जयवंत । गळां बांधोनि लंकानाथ । सर्वे घेवोनि प्रधान समस्त । पुरीं प्रवेशला आपले ॥९०॥ बळीस जिंतोनि शचीपती । नगर प्रवेशे अमरावती । तैसा रायें जिणोनि लंकापती । आपले नगरीं प्रवेशला ॥९१॥ पुढिले प्रसंगीं निरूपण । पौलस्ति येवोनि सोडवील रावण । श्रोतीं होवोनि सावधान । श्रवण कीजे कथेतें ॥९२॥ एका जनार्दनीं करी विनंती । पुढील कथा परिसिजे संतीं । जिचेनि श्रवणें अघें[1] नसती । स्वानंदस्थिती पाविजे ॥९३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणबंधन नाम एकविंशतितमोऽध्याय: ॥२१॥ ओंव्या ॥९३॥

## अध्याय बाविसावा

॥ श्रीराम प्रसन्न ॥

### रावणाची सुटका

**रावणाची दुर्दशा :** माहिष्मतीनामें नगरी । तेथें सहस्रार्जुन राज्य करी । तयाचे बंदीं श्रीराघवारी । कित्येक दिवस पडियेला ॥१॥ श्वानावाणी शूकरावाणी । जाई मार्गे खरावाणी । दाही शिरीं वाहे पाणी । अन्नालागोनी रावण ॥२॥ ऐसा कित्येक दिवसपर्यंत । माहिष्मतीनगरी भीक मागत । विसांहातीं कांती सूत । उदरार्थ दशानन ॥३॥ तंव येरीकडे प्रहस्त प्रधान । पौलस्तिमुनीसी स्वर्गीं जाऊन । सांगितलें स्वामी रावणालागून । सहस्रार्जुनें बंधन केलें ॥४॥ माहिष्मतीनगराआंत । रावण असे भीक मागत। नगराबाहेर येवों नेदित । कोंडोनि तेथ राखिला ॥५॥

**रावणाचा पिता माहिष्मतीला निघाला :** ऐकोनि रावणासि बंधन । कोपें खवळला ब्रह्मनंदन । पुत्रस्नेहें कळवळोन । वायुवेगें चालिला ॥६॥ मनोवेग सांडोनि मार्गे । त्वरें चालिला बहुत रागें । माहिष्मतीप्रांतास वेगें । येवोनि नगर देखिलें ॥७॥ दूरोनि देखिली नगरी । जैसी इंद्राची अमरपुरी । जेथें अर्जुन[2] वसे महाक्षत्री । सहपरिवारीं मिळोनी ॥८॥ नगरीं नाहीं दुःखदैन्य । नगरीं नाहींत दरिद्री जन । लोक वसती धार्मिक संपन्न । स्वप्नीं अधर्म पैं नाहीं ॥९॥ पौलस्ति ब्रह्मयाचा नंदन[3] । तपस्तेजें देदीप्यमान । जैसा गगनीं सहस्रकिरण । पुरीं प्रवेश पैं केला ॥१०॥ आला महाद्वारासंमुख । द्वारपाळां जाणवी मुनिटिळक । म्हणे रायासि सांगा आवश्यक । पौलस्ति ऋषि आलासे ॥११॥ द्वाररक्षकें नृपनाथा । जाणविली ते व्यवस्था । म्हणे राया पुलस्ति तत्वतां । आला असे महाद्वारीं ॥१२॥

**पौलस्तीचा अर्जुनाकडून सत्कार :** द्वारपाळमुखें वचन । रायें ऐकोनि तेचि क्षण । पाचारोनि[4] पुरोहित ब्राह्मण । सर्व सामोग्रीसीं निघाला ॥१३॥ सर्वे पूजेचा संभार[6] । रायें जोडोनि दोन्ही कर । निघालासे ऋषीसमोर । अति नम्र होवोनी ॥१४॥ पुढें पुरोहित मागें नृपती । शीघ्र आले ऋषीपती । साष्टांगें नमूनि पुलस्ती । मग पूजा पैं केली ॥१५॥ ब्राह्मणा दिधले गोदान । मंगलतुरें वाद्यें लावून । पुढे पुलस्ति मुनि करून । राजमंदिरीं प्रवेशला ॥१६॥ पुनरपि मंदिरीं

---

**शब्दार्थ –** १. पातकसमुदाय, २. राजा सहस्रार्जुन, ३. मुलगा, ४. सूर्य, ५. बोलावून, ६. साहित्य

मागुतीं । पूजा केली अति निगुतीं । स्नानें करवोनि विप्रपंक्ती । समस्तां भोजना पैं झालें ॥१७॥ हात जोडोनि पुलस्तीप्रती । अर्जुन करीतसे विनंती । म्हणे स्वामी तुम्ही आलेती । म्हणोनि चरणांप्रती लागला ॥१८॥ आजि माझें सफळ जन्म । आजि माझें सफळ कर्म । आजि माझें सफळ धाम । स्वामीनें आगमन पैं केलें ॥१९॥ आजि माझी सफळ नगरीं । आजि मी सफळ संसारीं । तुम्ही आलेति येथवरी । जे नाना तपीं न भेटां ॥२०॥ राजा म्हणे ऋषीप्रती । हें राज्य ऐश्वर्य पुत्र संपत्ती । सर्व स्वामीचेनि निश्चितीं । मी आज्ञाधार किंकर[1] ॥२१॥ ऐकोनि रायाचें धर्मवचन । नगरीं देखोनि सज्जन जन । काय बोलिला ब्राह्मण । तें सावधान अवधारिजे ॥२२॥ मुनि म्हणे नृपसत्तमासी । राया कमळनयना परियेसीं । तुझ्या तुळणे न पावती रविशशी[2] । पराक्रमियांमाजि पंचानन[3] ॥२३॥ ऐक राया सावधान । तुझ्या पराक्रमासि ठेंगणें गगन । यक्ष गंधर्व सिद्ध चारण । आज्ञाधारक जयाचे ॥२४॥ जेणें वरदबळें सृष्टीं जाण । जिंतिले सकळही नृपगण । जयाचे बंदी सुरगण[4] । इंद्र आदिकरोनियां ॥२५॥ ऐसा पराक्रमी दशानन । तुवां जिंतिला न लागतां क्षण । तुझी कीर्ति मी ऐकोन । तुझिये भेटीस पैं आलों ॥२६॥

**पौलस्तीच्या मागणीप्रमाणे अर्जुनाने रावणाला मुक्त केले :** माझें मागणें नाहीं अर्थ । माझें मागणें एक लंकानाथ । तो द्यावा मजलागीं त्वरित । उदार चित्त करोनियां ॥२७॥ ऐकोनि ऋषीचें वचन । रायें आदरें सोडिला दशानन । रत्नजडित मुकुट देवोन । सर्वालंकारीं शृंगारिला ॥२८॥ मैत्री करोनि रावणासीं । ब्राह्मण देव अग्नि साक्षीसीं । करोनि रायें सोडिलें त्यासी । श्रीरामा ऐसी कथा झाली ॥२९॥ मग पुलस्ति मुनिवर आलिंगून दशशिर । म्हणे बा रे श्रमलासि थोर । नगरीं विपत्ति फार भोगूनी ॥३०॥ ऐकोनि पित्याचें वचन । लाजिला तो दशानन । म्हणे वाचल्याचें फळ कोण । याहूनि मरण पैं भलें ॥३१॥ पुलस्तीनें यया रीतीं । सोडवोनि लंकापती । आपण गेला ब्रह्मलोकाप्रती । सावध वृत्ती करोनियां ॥३२॥ दशइंद्रियीं जो अति समर्थ । तयासि म्हणती लंकानाथ । तो पुलस्तीनें करोनि मुक्त । आपण ब्रह्मलोका पैं गेला ॥३३॥ याउपरी तो लंकापती । मागुतेन विचरता झाला क्षितीं । पुढें कथा वर्तली ते श्रोतीं । सावधवृत्ती अवधारा ॥३४॥ एका जनार्दना शरण । पुढे वाळिगृहीं दशानन । भोगील विपत्ति दारुण । सावधान श्रवण कीजे ॥३५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणबंधमुक्तिर्नाम द्वाविंशतितमोऽध्यायः ॥२२॥ ओंव्या ॥३५॥

## अध्याय तेविसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### वाली-रावणाचे सख्य

रणी धरोनि रावण । सहस्रार्जुनें केलें बंधन । तेथें पुलस्ति मुनि येऊन । मागोनि दशानन सोडविला ॥१॥ पुलस्ति गेला स्वर्गासी । मागें रावण विचरे अवनीसीं । जे जे राजे जे जे देशीं । त्या त्या स्थळासी आपण जाये ॥२॥ तयांते जिंती रावण । राक्षस अथवा राजे जाण । अथवा देव सिद्ध चारण । अधिक बळ ऐकोन संग्राम करी ॥३॥

**रावणाचे किष्किंधेला आगमन :** तदनंतरें लंकानाथ । हिंडत असतां प्रधानांसमवेत । तंव पुढें किष्किंधेचा प्रांत । देखोनि त्वरित तेथ आला ॥४॥ तें किष्किंधा नगरी कैसी । दुसरी

शब्दार्थ – १. सेवक, २. सूर्यचंद्र, ३. श्रेष्ठ, ४. देव.

अमरावती ऐसी । पुरंदरात्मज पाळी जियेसी । वर्णना तिसी न करवे ॥५॥ भोंवती नाना परींची वनें । सरोवरें भरलीं शीतळ जीवनें । देखोनि मार्गस्थांचीं मनें । थोर विश्रांति पावती ॥६॥ पंपासरोवराचे तीरीं । ब्रह्मयानें वसवली नगरी । इंद्रादिकां अटक भारी । तेथें राज्य करी शक्रसुत[1] ॥७॥ देवां वाळी दैत्यां वाळीं । सिद्ध चारण कांपती चळीं । इंद्रवरदमाळा जवळी । बळें वाळी अजिंक्य देवां ॥८॥ ऐसा वाळीच्या पुरासी । रावण आला दशशिसी । नगरद्वारीं प्रवेशतां प्रधानासी । वाळीचिया देखिलें ॥९॥

रावणाचे वालीला आव्हान : रावण म्हणे गा मंत्रिया तारा । जाणवीं आपुलिये वानरेश्वरा । युद्धाकारणें दशशिरा । येथें येणें पैं झालें ॥१०॥ जरी सामर्थ्य असेल तुम्हांसी । तरी युद्ध करावें मजसीं । नाहीं तरी शरण रावणासी । शीघ्रकाळेसीं पैं यावें ॥११॥

समुद्रस्नानाहून वाली येईपर्यंत धीर धरण्याची रावणाला सूचना : ऐसें रावणाचें वचन । तार-प्रधानें ऐकोनि जाण । प्रत्युत्तर छळणेंकरून । तयाप्रती बोलतसे ॥१२॥ तारापतिवाळीसीं रण । करूं इच्छितोसी रावण । तरी धीर धरीं एक क्षण । शक्रसुत येईल आतां ॥१३॥ राजा वाळी तो स्नानासी । गेला असे समुद्रासीं । संध्या सारोनि तुम्हांपासीं । येईल युद्धासी करावया ॥१४॥ सहजस्थितीं किष्किंधानाथ । नित्य चतुःसमुद्रीं स्नानसंध्या करीत । तो ये तंवपर्यंत । स्वस्थचित्तें असावें ॥१५॥

वालीच्या अचाट सामर्थ्याचे रावणाकडे वर्णन : ऐकें लंकेशा सावधान । तुवां जरी केलें अमृतपान तरी वाळिहस्तें तुझा प्राण । क्षणार्धे जाण जाईल ॥१६॥ जरी तूं झालासी वज्रशरीरी । तरी वाळीपुढें तुझी नुरेचि उरी । निमेषामाजि समुद्र चारी । स्नान करोनि जो येतो ॥१७॥ देवां दानवां मागतां रण । तिहीं पाठविला वाळीपासीं जाण । तो दुदुभि समरांगण । वानरेसीं करूं पाहे ॥१८॥ ऐसा दुंदुभि समर्थ । वाळीने मारिला निमेषांत । पैल पडिलासे कलेवरपर्वत[2] । मंदराचळ दूसरा ॥१९॥ जरी तुज प्रसन्न त्रिपुरारी । तुवां जिंतिले राजे पृथ्वीवरी । तरी वाळिदर्शनें तुझी उरी । नुरे निर्धारीं जाणतों मी ॥२०॥ अथवा तांतडी असेल तुझे पोटीं । तरी जाय दक्षिण-समुद्राचे तटीं । रायासीं तुज होईल भेटी । संग्रामीं सुखी करील ॥२१॥ दक्षिणसागरीं करोनि स्नान । बैसलासे कपि दुसरा भान । तेजें अत्यंत विराजमान । देखोनि मन निवेल तुझें ॥२२॥

वालीशी युद्ध करण्यासाठी रावण समुद्रावर गेला : वाळी आहे समुद्रतीरीं । ऐसे ऐकोनि सुरारी । चालिला जैसा कज्जळगिरी । बहु क्रोधेंकरीं उंचबळत ॥२३॥ दुरोनि देखिला ताराकांत । ध्यानस्थ बैसला जैसा पुण्यपंडित । तयासी धरावया निशाचरनाथ । पुष्पकावरोनि उतरला ॥२४॥ बक जैसा गंगातीरीं । हळुच पावलीं मत्स्य धरी । सांचोळ नव्हतां तस्कर घरीं । लक्ष्मीवंताचे पैं रिघे ॥२५॥ तैसा रावण हळुच पाउलीं । चालिला पापी धरावया वाळी । तंव तो शक्रसुत नेत्रकमळीं । रावणातें अवलोकी ॥२६॥

रावण आपल्या वीस हातांनी वालीला पकडण्यासाठी जाताच वालीनेच त्याला काखेत पकडले : विसांही भुजींकरून । धरूं गेला जों रावण । तंव वाळीनें हात उचलोन । कांखेतळीं दडपिला ॥२७॥ दहा शिरें लंकानाथा। कांखेखालें झाला दडपिता । पुनरपि तो समुद्रीं तत्वतां । स्नानाकारणें जाता झाला ॥२८॥ रावण असोनि कांखेतळीं । करितां समुद्रीं आंघोळी ।

---

शब्दार्थ – १. वाळी, २. प्रेतांचा ढीग.

नाकी तोंडीं क्षारजळीं । कासावीस रुदन करी ॥२९॥ वाळी अवलोकी नावेक[1] । तंव दहा तोंडें काळें मुख । दाही मस्तकीं मुकुट देख । भुजा विंशति लोंबती ॥३०॥ शरीर दीर्घ लंबायमान । कांखेतून लोंबती चरण । जैसा खगेश्वर[2] पन्नग धरून । नेतसे तैसा वाळीही ॥३१॥ ऐसा चहूं समुद्रीं संध्यातर्पण । करोनि अमरेशनंदन । श्रमरहित वीर जाण। नगरप्रांतालोगोन पैं आला ॥३२॥ म्हणे म्यां घालोनि काखेतळीं । केलिया समुद्रीं आंघोळी । तरी कोण दशा तया झाली । विचारोनि भलीं पाहों पां ॥३३॥

**समुद्रस्नानाने कासावीस झालेल्या रावणाची वालीकडून सुटका :** ऐसें विचारून ताराकांत । मग दोन्ही उचलिले हात । तंव कांखेतून लंकानाथ । सुटोनि पुढें पडियेला ॥३४॥ वाळी म्हणे तूं कोणाचा कोण । दक्षिणसमुद्रीं यावया काय कारण । मज धरीत होतासि किंनिमित्त जाण । समूळ कथन सांग आतां ॥३५॥ वाळी हांसोन ते काळीं । विस्मयो पूर्ण हृदयकमळीं । तंव राक्षसेंद्र बद्धांजळी[3] । विनविता झाला ते समयीं ॥३६॥ शुक्रसुता तुझ्या बळाची थोरी । उपमा देवों तरी या त्रिभुवनामाझारी । वीर देखिले परी तुझी सरी । कल्पांतीं ते न पावती ॥३७॥ म्यां आपुलेनि बळें मही । जिंतिली चतु:समुद्र पाहीं । परी तुझ्या बळा समता नाहीं । माझ्या दृष्टीं पडिली आजवरी ॥३८॥

**रावणाची शरणागती व वालीजवळ मैत्रीची इच्छा :** मी आलों युद्धाकारणें । त्वां मज धरोनि चतु:समुद्रीं स्नानें । केलीं आतां मज रक्षणें । जीवदान झणें देवोनी ॥३९॥ श्रम न पावतां वाळी । तुवां मज घालोनि कांखेतळीं । केल्या समुद्रीं आंघोळी । तू आतुर्बळी त्रिभुवनीं ॥४०॥ आतां वानरेशा अवधारीं । तुवां मजसीं करावी मैत्री । आम्हां तुम्हां साक्षी अग्नि धरित्री । आणि साक्षी द्विजदेव ॥४१॥ माझे स्त्रीं पुत्र ऐश्वर्य । आणिकही जे पदार्थ तव सर्व । तुज मज वेगळीकभाव । नाहीं गौरव हा मैत्रीचा ॥४२॥ तुमचें आमचें इष्टपण । हें त्रैलोक्यीं होय भूषण । मी तुझा मित्र हे देवगण । थोर भयातें पावती ॥४३॥

**परस्परांचे सख्य :** मिळोनियां दोघी जणीं । मित्रत्व करूं साक्षी अग्नी । मग प्रवेशले किष्किंधा भवनीं । राक्षसेश्वर आणि हरिपुंगव ॥४४॥ अमरेंद्रसुत पौलस्तितनयो । एक होउनी वीर-बाहो । किष्किंधा प्रवेशले सोमसूर्यो। मंडळीं पहा हो गगनाचिये ॥४५॥ कीं सिंह प्रवेशे पर्वतदरीं । कीं व्याघ्र वसे झाळीभीतरीं । कीं गुहेसी वसिजे योगीश्वरीं । तयापरी नगरीं स्थिरावले ॥४६॥ एकमासपर्यंत राघवारी । राहिला होता किष्किंधापुरी । मग प्रधानांसमवेत सुरारी । त्रैलोक्यीं विचरता झाला पैं ॥४७॥ ऐसे पूर्वी थोर थोर । ते रावणें केले किंकर । तया रावणातें कपीश्वर । कांखे असोनि हिंडिन्नला ॥४८॥ ऐसा शक्रसुताचा पराक्रम । देवां दानवां दुर्घट परम । तया निर्दाळिता तो तूं श्रीराम । पूर्णब्रह्म अवतार ॥४९॥ पतंग जैसा दीपावरी । बुडोनि मरे स्नेहाभीतरीं । तैसे तुवां आपुले वैरी । रणसागरीं मारिले ॥५०॥ एका जनार्दना शरण । श्रीराम कथा भवतारण । पुढील कथानुसंधान । तें निरूपण अति गोड ॥५१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणवाळिमित्रत्वं नाम त्रयोविंशतितमोऽध्याय: ॥२३॥ ओंव्या ॥५१॥

शब्दार्थ - १. क्षणभर, २. गरुड, ३. हस्त जोडून.

# अध्याय चोविसावा

॥ श्रीशंकराय नमः ॥

## नारदांचे यमपुरीला आगमन

**रावणाला नारदाचे दर्शन :** गत कथा झाली ऐसी । जे कां कलिकल्मष[1] नाशी । तदनंतरें विचारतां नारदासीं । राक्षसेश्वरें देखिलें ॥१॥ नारद जातां गगनीं । रावणें देखिला दुरोनी । म्हणे देवऋषि कृपा करूनी । नावेक येथवरी येइजे ॥२॥ म्हणोनि केलें नमन । दोन्ही कर जोडोन । स्वामी क्षेम कुशळ कल्याण । हें तुम्हांस पुसणें न लगे ॥३॥ तुमचेनि भूतमात्र प्राणी । स्वानंदें वर्तती निजस्थानीं । तुम्ही विचरां परोपकारालागोनी । तुमच्या दर्शनीं मी धन्य ॥४॥ ऐकोनि विबुधारिजनकाचें वचन । मग बोले नारद भगवान । म्हणे राया तुझें वैभव देखोन । आनंदें पूर्ण निवालों ॥५॥

**नारदांकडून रावणाची स्तुती :** तुज पुष्पकासारिखें विमान । इंद्रजिताऐसें पुत्रनिधान । जयाचे आहारा न पुरे त्रिभुवन । तो बंधु कुंभकर्ण पैं तुझा ॥६॥ प्रताप सकळांहूनि आगळा । जिणिलें त्वां क्षितिपाळां । तुझे ठायीं भावो भूपाळा । देखोनियां निघालों ॥७॥ राक्षसाधिपा तुझी थोरी । न देखों त्रिभुवनामाझारी । सदाशिव आज्ञाधारी । विष्णूस तेथें कवण पुसे ॥८॥ देव दैत्य गंधर्व । सिद्ध चारण मुनिपुंगव । आणीक पृथ्वीपति सर्व । समरांगणीं जिंतिले ॥९॥ ऐसा पराक्रम दारुण । देखोनि मी तुष्टमान । परी कांहीएक वचन । हितालागोन सांगतसें ॥१०॥ राक्षसेंद्रा अवधारीं । माझिया वचनाची थोरी । तुवा जिंतिले ते सामान्य अरी । जे काळचक्रीं पडिले असती ॥११॥ जें संसारीं गांजिले । ते मृत्यूनें मारिले । जे प्रारब्धीं घातले । ते मेले आपुलेनि कर्मे ॥१२॥ जे संसारबांदवंडीं[2] पडिले । जे मी माझें म्हणत गेले । जे विधिनिषेधीं नाडिले । ते पडिले काळचक्रीं ॥१३॥ माझी स्त्री माझे पुत्र । माझें धन माझें गोत । जयांचें भ्रांत झालें चित्त । तयां ग्रासिलें कळिकाळें ॥१४॥ तुवां मारिले गांजिले हे वदंती[3] । मिथ्यात्वें भासे माझे चित्तीं । ऐसें ऐकोनि लंकापती । नारदाप्रती बोलिला ॥१५॥ अहो जी ऐका नारदमुनी । आतां रसातळा जातों दैत्यमर्दनीं । आपुले करें तयां जिंतोनी । समरांगणीं भिडोनियां ॥१६॥ मग समस्त जिंतिल्यावरी । ज्याचे त्यांस करीन अधिकारी । पुढें समुद्र मथीन त्याउपरी । अमृतपानाकारणें ॥१७॥ ऐसें रावण बोलिल्यावरी । ऐकोनि नारद ते अवसरीं । प्रत्युत्तरशब्दचातुरीं । बोलतसे रावणेसीं ॥१८॥

**नारदांचा यमाला जिंकण्याचा रावणाला सल्ला :** तुज रसातळासि जातां । आम्हासि सुख न वाटे सर्वथा । मी सांगतों त्या मार्गें लंकानाथा । समस्तां सुख होईल ॥१९॥ अति दुर्गम कठिण । ब्रह्मादिकां न कळे जाण । त्या मार्गीं करावें गमन । प्रेतराज तेथें असे ॥२०॥ वैरी त्रासूनि तूं उद्भट । इये मार्गीं जाय स्पष्ट । यमराज बळें अचाट । त्यातें रणीं जिंकिजे ॥२१॥ जया यमाचा सर्वां दंड । जेणें दंडिले प्राणी उदंड । जया दंडाभेणें जन अखंड । शरण हरीसी पैं जाती ॥२२॥ प्रेतराज तो पापियां यम । साधुजनांतें तोचि धर्म । सांगतां त्याचा पराक्रम परम । त्यासि दशानन पुरवसी ॥२३॥

**यमाला जिंकण्याचा रावणाचा निर्धार :** मुनीची ऐकोनि गोष्टी । राक्षसें हाक मारिली मोठी । जैसा मेघ कडकडाटीं । गर्जतसे पर्जन्यकाळीं ॥२४॥ कुंभकर्णानुज म्हणे नारदमुनी । माझें वचन ऐकें सावधानीं । यमराम मारिला हे सत्य वाणी । तुम्हीं असत्य न म्हणावी ॥२५॥ मी

---

शब्दार्थ – १. कलीसंबंधी पाप, २. संसारपाशात, ३. वार्ता, गोष्ट.

जातों दक्षिणदिशेसी । जेथें रविसुत[1] करी राज्यासी । माझेही नारदा मानसीं । क्रोध अत्यंत उचंबळत ॥२६॥ प्रत्युत्तर माझें ऐक वचन । मी तयातें मुनि दंडीन । छेदीन तयाचा अभिमान । जेणें प्राणिगण दंडिले ॥२७॥ ऐसें बोलोनि मंदोदरीकांत । मुनीस करोनी दंडवत । येतां झाला लंकानाथ । प्रधानांसमवेत दक्षिणे ॥२८॥ मग तो नारद महाऋषी । जयाच्या तेजें कळाहीन रविशशी । जयाचें वचन देवां दैत्यांसी । अति प्रीतीसीं रूचतसे ॥२९॥ ब्रह्मनिष्ठेचा जो सागर । ब्रह्मदृष्टीं देखे चराचर । ब्रह्मयाचा मानसकुमर । ब्रह्मादिकां पार न कळे ॥३०॥ ब्रह्मवीणा वाजवीत । ब्रह्मानंदें डुल्लत । ब्रह्मपदें मुखीं गात । गात नाचत ब्रह्मानंदें ॥३१॥ ऐसा तो नारद महामुनी । रावणाचें वचन ऐकोनि । क्षणैक विचारिता झाला मनीं । जैसा अग्नि तैसा ऋषि ॥३२॥ माझे वचनें हा रावण । यमरायासीं करील रण । तरी मी यमासी सांगेन । येतो रावण युद्धातें ॥३३॥ प्रेतराज दंडपाणी । तयातें प्रार्थीन युद्धालागूनी । जयाचेनि धाकें प्राणी जनीं । श्रीहरिभजनीं प्रवेशती ॥३४॥ तरी आपला हाचि विचार । म्हणोनि उठिला ब्रह्मकुमर[2] । चालिलासे अति सत्वर । मनोवेग टाकोनि मार्गे ॥३५॥

नारदांचे यमनगरीत आगमन : ऐसा तो ब्रह्मर्षी । आला प्रेतराजनगरासी[3] । नगरी देखोनि हर्ष मानसीं । जैसी दुसरी अमरावती ॥३६॥ प्रेतराज रायाचें नाम । यमधर्म दुसरें परम । प्राणियांचे दोषधर्म । जाणोनि तैसें दंडित ॥३७॥ जयांसी भगवद्भजनीं नाहीं भक्ती । अधर्मटोले माथां वाजती । ज्यांसी गृहाश्रमी अत्यासक्ती । ते दंड पावती प्रेतरायाचा ॥३८॥ ऐसा तो नारद महामुनी । आला प्रेतपुरीलागूनी । म्हणे कलहो पावोन पुरे धणी । म्हणोनि पाय अवनीं आफळित ॥३९॥ माथेची शेंडी तडाडी । कलहाची थोर आवडी । म्हणोनी तो लवडसवडीं । प्रेतराजनगरा पैं आला ॥४०॥ एका जनार्दना शरण । राक्षसां यमासीं युद्ध दारुण । होईल तें परसा सावधान । निज अवधान देवोन ॥४१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां नारदप्रेतपुरीआगमनं नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥२४॥ ओंव्या ॥४१॥

## अध्याय पंचविसावा

॥ श्रीशंकराय नमः ॥

### यमाच्या सैन्याचा विध्वंस

नारदांचे यमलोकी आगमन : ऐसें विचारोनि ब्रह्मकुमर । प्रेतपुरीस आला सत्वर । जेथे प्रेतराज सहपरिवार । परिवेष्टित बैसलासे ॥१॥ नारदें यम देखिला । जैसा हुताशन प्रज्वळिला । आपण मध्यें मिरवला । खमंडळीं[4] कश्यपसुत[5] ॥२॥ प्राणियांचें जैसें कर्म देखे । तयां दंड करी कर्मासारिखे । ऐसें करितां अकस्मात देखे । पातला विरंचिसुत नारद ॥३॥ आला देखोनि नारदमुनी । यमराव हरिखेला मनीं । षोडशोपचारीं पूजूनी । मधुरवाणीं बोलिला ॥४॥ अहो जी मुनिचक्रचूडामणी[6] । क्षेम असे तुम्हांलागोनी । स्वधर्म रक्षितसां अनुदिनीं । किंप्रयोजनीं आगमन ॥५॥ सकळ सुर आणि सुरपती । देव गंधर्व ऋषिपंक्ती । आणि असुरही सेविती । तो तूं आलासि कोणें अर्थी ॥६॥ कोणा कार्याचे विधी । तू आलासि कोणे बुद्धीं । तें मज सांगावें कृपानिधी । ऐसें प्रेतराजें प्रार्थिलें ॥७॥

रावण जिंकण्यासाठी येत असल्याचे नारदाने सांगितले : ऐकोनि धर्मरायाचे वचन । बोलता

---

शब्दार्थ - १. यम, २. नारद, ३. यमपुरीला, ४. आकाशांत, ५. सूर्य, ६. मुनिश्रेष्ठ.

झाला नारद आपण । माझिया आगमनाचें लक्षण । सावधान अवधारीं ॥८॥ वर्तलें तें आईक राया । ब्रह्मवरदें उन्मत्त होवोनियां । रावण ऐसें नाम जया । सा[1]चारी[1] शिरें मस्तकीं ॥९॥ तो राक्षस पुष्पकीं आरूढोन । मंत्रियांसहवर्तमान । तुज जिंतावया आपण । येतो म्हणोन् मी सांगों आलों ॥१०॥ तुझें दंडाची दुर्धर शक्ती । स्वप्नीं प्राणी भय वाहती । तया तुज आजि कोण गती । होईल तें न कळे ॥११॥ ऐसें बोलतां नारदमुनी । तंव अकस्मात सूर्यासारिखें गगनीं । देखिलें येतां तेज नयनीं । आणि दशदिशा उजळल्या ॥१२॥ दिगंतबाहेर ते समयीं । तिमिर गेलें नव्हतेंच पाहीं । बोलतां देखा समीप लवलाहीं । येतें झालें विमान ॥१३॥ तया पुष्पकविमानावरी । बैसलासे सुधापानियांचा[2] अरी । पीडित प्राणी होते ते क्षणामाझारी । भुजबळें सोडविलें ॥१४॥

रावणाने पापी लोकांना मुक्त केले : पापी पुरुष सोडविले कैसे । रौद्ररूप भयानक घोर ऐसें । बांधिलें होते ते यमफांसें । देहीं कृशत्व पावले ॥१५॥ एक देती दीर्घ हाक । एक आरडती पावोनि दुःख । एकां कृमिकीटकादिक । मांस तोडोनि भक्षिती ॥१६॥ एकांतें श्वान तडतडां तोडी । एकांतें करिती ओढाओढी । एकांतें म्हणती पाडीं पाडीं । कडोविकडी गांजिती यमदूत ॥१६॥ पुढे वैतरणी[3] शोणितोदकें[4]। दोन्हीं तीरीं पाहें पूर देखें । तियेंत प्राणी कित्येकें । बुचकळ्या देती निजकर्मे ॥१८॥ सप्तवाळुकेंत कित्येक प्राणी । उभे राहिले निजकर्म भोगोनी । कित्येक अधर्मी असिपत्रवनीं[5] । वृक्षपर्णी शयन करिती ॥१९॥ शस्त्रधारा अति तीक्ष्ण । तैसींच आहेत पर्णे जाण । तेथें करविती पापियां शयन । सर्वांग छिन्नभिन्न होतसे ॥२०॥ रौरव आणि क्षारनदीप्रती । प्राणियांतें लोटोनि देती । खालते जाती वरती येती । येती काकुळती हा कर्मा ॥२१॥ एक क्षुधित होऊन । करितां निजकर्मभक्षण । एक संसारतृषेनें पीडोन । विवर्णमुख[6] पैं झाले ॥२२॥ वाल्मिकिरामायणाप्रती । पातकी बोलिले बहु असती । तितुके सांगतां कथा विस्ताराप्रती । जाईल निश्चितीं जाणिजे ॥२३॥ न सांगतां दोष दारुण । वाल्मीकिग्रंथासि विरुद्धपण । येईल म्हणोनि संकलित जाण । निरूपण पैं केलें ॥२४॥ यालागीं मी संतांप्रती । येतसें काकुळती । तयावरी नेणें शास्त्रव्युत्पत्ती । क्षमा श्रोतीं मज कीजे ॥२५॥ अबुद्ध सुबद्ध दाशरथिकथन । करितां तुटे संसारबंधन । ते नर होती पुण्यपावन । ऐसें भगवान बोलिलासे ॥२६॥

मुक्त झालेल्यांना आनंद : ऐसें पापी आणि गुरुद्रोही । विश्वासघातकी हिंसक पाहीं । ते रावणें सोडविले लवलाहीं । पळतें झाले दशदिशां ॥२७॥ कित्येक गायन करित । कित्येक आनंदें नाचत । कित्येक स्वधर्मीं रत । तयांतेही देखत रावण ॥२८॥ कित्येक गुरुभजनीं तत्पर । कित्येक शास्त्रीं चतुर । कित्येक दानधर्मीं शूर । याचकां देहो पैं देती ॥२९॥ कित्येक गोदानी पुरुष । ते भोगिती स्वानंदगोरस । कित्येकां अन्नदानीं हर्श । ते निजानंद परेश सेविती ॥३०॥ स्वानंदें भक्ति करोन । जिहीं पूजिला शैलजारमण । ते नर पुण्यपावन । भोग भोगून अभोक्ते ॥३१॥ ऐशिया धार्मिकांतें देखोन । संतोषला दशानन । म्हणे धन्य धन्य साधुजन । जे नगरीस राहिले ॥३२॥

यमदूतांनी रावणसैन्याची दाणादाण केली : पापियांतें करोनि मुक्त । पुढें चालिला लंकानाथ । हें देखोनि यमराजदूत । क्रोधें रावणावरी त्वरित धांवले ॥३३॥ परिघ पट्टिश मुसळ । शक्ति

---

शब्दार्थ - १. दहा, २. देवांचा, ३. यमपुरींतील नदी, ४. रक्तरूप उदकाने, ५. तरवारींच्या वनांत, ६. निस्तेज तोंडाचे.

तोमर आणि शूळ । पुष्पक वेढोनियां सकळ । घोरांदर मांडिलें ॥३४॥ आसनें तोरणें पताका । पुष्पकीं होत्या वेदिका । विमाना ताडातोडी केली देखा । निमेषा एका न लावितां ॥३५॥ जैसें ब्रह्मगिरीसीं भ्रमर । शिखरीं प्रवेशतां करिती जर्जर । प्रेतराजसैनिकीं दशशिर । तद्वत वेढोनि सत्वर घेतला ॥३६॥ रावणा केला अपमान । प्रेतराजसैनिकीं जाण । आणि रावणाचे प्रधान । तेहीं रणीं शक्तिहीन झाले ॥३७॥ कित्येक झाले घायाळ । कित्येकांचें फुटलें कपाळ । कित्येकांसी सुटला पळ । कित्येकीं रणमंडळ सांडिलें ॥३८॥ कित्येक जर्जरीभूत झाले । कित्येक मूर्च्छित पडियेले । कित्येक रणीं निवटिले । महादारुण दादुले योद्धे ॥३९॥ जैसे पळस वसंतीं । फुलले शोभा वना देती । तैसे राक्षस रणपंथीं । अशुद्धेंकरीं[१] अति डवरले ॥४०॥ यमसैन्यें केली ख्याती । रावणाचें कवच भेदोनि क्षितीं । रावण केलासे विरथी । भूमीवरी निगुतीं आणिला ॥४१॥

**रावणाने सैन्याला आवाहन करून पाशुपतास्त्र सोडले :** मग रावणें काय केलें । माहेश्वरी ठाण मांडिलें । कार्मुकीं बाण चढविले । सवें ओढिलें कर्णांत ॥४२॥ अरिसैनिकांतें म्हणे रहा सहा रणीं । पळों नका सोडून धरणी । ऐसें बोलोनि रावणें तत्क्षणीं । कार्मुकीं बाण झणीं लाविला ॥४३॥ तो बाण पाशुपतमंत्र जपोन । जोडिला क्रोधेंकरोन । करोनि अग्नि-आवाहन । सज्जुनि त्वरें सोडिला ॥४४॥ तो अग्निमयचि बाण । निघाला गर्जत गगन । तेणें दशदिशांचे श्रवण[२] । बधिर झाले जाण ते समयीं ॥४५॥

**त्रैलोक्यांत घबराट :** त्या पाशुपताचें गर्जन मोठें । चालिलें थोर नेटेंपाटें । तेणें कळिकाळा शारें[३] खटखटे । दंत दाढा वाजवित ॥४६॥ खमंडळींहून नक्षत्रें च्यवती । चंद्रसूर्य भयभीत चित्तीं । दिग्गज थरथरां कांपती । अवनी पालथी होऊं पाहे ॥४७॥ अब्धि मर्यादा सांडूं पाहती । कूर्म दचकलासे चित्तीं । सदाशिवासि झोंबे पार्वती । कंठी मिठी घातली ॥४८॥ सावित्री म्हणे ब्रह्मयातें । ब्रह्मांड होऊं पाहे पालथें । तंव लक्ष्मीनें आपुले कांतातें । थापटोनि विष्णूतें उठविलें ॥४९॥ रमा म्हणे जी जगन्नाथा । भय वाटे माझिया चित्ता । तूं प्राणियां अभय देता । भवव्यथा निवारिसी ॥५०॥ तुझे कृपेचेनि पडिपाडें । हें त्रैलोक्य नांदें सुरवाडें । तुझिया जी दृष्टी पुढें । हें जग राहे नासे जी ॥५१॥ तूं ब्रह्मा स्रजिता विधाता । तूं प्रतिपाळिसी जी तत्वतां । तूंचि शिव संहार करिता । तुज नेणती तत्वतां मतिमंद ॥५२॥ देवा हे अचाट ध्वनी । पडिली माझिये श्रवणीं । ईपासोनि कृपा करोनी । निजजनातें रक्षावें ॥५३॥ ऐकोनि लक्ष्मीचीं वनचें । अभय दिधलें जनार्दनें । पुढें त्या पुलस्तिकुळ-भूषणें । काय केलें अवधारा ॥५४॥ पाशुपतास्त्र अरिसैन्यावरी । पाडिलें हुताशन भस्म करी । जैसा वणवा लागे डोंगरीं । वन जाळीं असंख्य ॥५५॥ वैवस्वतसैन्य रणीं । भस्म होवोनि पडिलें धरणीं । ऐसें राक्षसीं देखानी । रावणेंसीं गर्जती सर्व ॥५६॥ एका जनार्दना शरण । विजयी झाला रावण । पुढील रसाळ निरूपण । श्रोतं सावधान ऐकावें ॥५७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणयमसैन्यविध्वंसो नाम पंचविंशतितमोऽध्यायः ॥२५॥ ओंव्या ॥५७॥

---

शब्दार्थ - १. रक्ताने, २. कान, ३. कंप.

# अध्याय सव्विसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

## यम व ब्रह्मदेव यांचा संवाद

मागिले प्रसंगीं पाशुपतास्त्र । रावणें सोडून भस्मीभूत । यमराजसैन्या केला अंत । तेणें हर्षे गर्जत राक्षस ॥१॥ विजयो पावला दशानन । म्हणोनि करिती गर्जन। तें वैवस्वत ऐकोन । क्रोधें दारुण उचंबळत ॥२॥

**यम युद्धाला निघाला :** नेत्र आरक्त करोन । आपुलें सैन्य पडिलें जाणोन । सारथियासि म्हणे शीघ्र स्यंदन[1] । आणीं युद्धा जावया ॥३॥ सारथियानें आणिला दिव्य रथ । वरी आरूढला प्रेतराज[2] रणपंडित । त्या रथाच्या घडघडाटश्रवणांत । दिग्गजांची टाळी बैसलीं ॥४॥ हातीं घेतला मुद्गर । मृत्युसारिखा तो उग्र । काळदंड घेवोनि कठोर । जाणों संहार करील ब्रह्मांडाचा ॥५॥ ऐसा तो विवस्वतात्मज[3] । रथीं आरूढला वीरराज । परिवेष्टित काळतुल्य सहज । गणांतें बैसविलें ॥६॥ मनीं थोर उल्लास । करीन राक्षसांचा विध्वंस । ऐसा यम वीरश्रियेचा सौरस । भोगावया चालिला ॥७॥

**राक्षससैन्यांत घराट उडाली :** यमराजाचें आगमन । देखोनि राक्षस कंपायमान । म्हणती हा प्रळय दारुण । आजि असे मांडला ॥८॥ रथ घडघडाटें रणक्षितीं[3]। सिंहनादें गर्जना करिती । आला तो राक्षससैन्याप्रती । जेथें पौलस्ती[4] उभा असे ॥९॥ एका मुहूर्तामध्ये जाण । आले रणांगणा घोडे दारुण । उपमा देतां उच्चैःश्रवा[5] न्यून । । रथींचे वारू जाण तैसे ते ॥१०॥ राक्षस देखोनियां भारी । अश्व हिंसती नानापरी । पाय न ठेविती पृथ्वीवरी । चंचलता मनापरीस अधिक ॥११॥ ऐसा आरक्त वारुवांचा रथ । वरी आरूढला प्रेतनाथ । देखोनि राक्षस भयभीत । धाकें थोर पळते जाहले ॥१२॥ रावणाचे प्रधानगण । तेही भयभीत दारुण । आणीकही स्थूळ सूक्ष्म जन । द्विजऋषिमुनिगण पळाले ॥१३॥

**रावण व यम यांचे द्वंद्वयुद्ध :** लोक भयातुर देखोन । दोघे करूं लागले रणकंदन । सोडिती शक्ति दारुण । वर्म लक्षोन हाणिती ॥१४॥ यम आणि तो रावण । सोडिती शक्ति तोमर दारुण । वीरांचे वीर वर्म लक्षोन । क्रोधेकरून उचंबळती ॥१५॥ दोघे जुंझती उसण्याघायीं । येरयेरांचीं वर्मे लक्षिती पाहीं । तंव रावणें केले काय ते समयीं । शर वर्षला दारुण ॥१६॥ जेंवी मेघांच्या धारा । वर्षोनि लोपविती गिरिवरा । तेंवी रावणें वैवस्वतरहंवरा- । वरी बाण टाकिले॥१७॥ त्या समयीं तो वीरराज । राया विवस्वताचा[6] आत्मज[6] । संधान करोनि रिपुबाण-समाज । रणरंगीं तोडिले ॥१८॥ खमंडळीं जीमूतांचें[7] पडळ । तोडी जैसा वायु प्रबळ । तेंवी वैरियाचें शरजाळ । समरांगणीं सकळ तोडिलें ॥१९॥ सप्तरात्रींपर्यंत । युद्ध केलें असंख्यात । दोघे समान रणपंडित । श्रम न पावत पैं दोघे ॥२०॥ देव गंधर्व सिद्ध ऋषी । पिशाच गृह्यक तापसी । आणि महंत संन्यासी । थोर आश्चर्यासी पावले ॥२१॥ तदनंतर दशानन । रिपूचें समान बळ देखोन । करिता झाला संधान । तें सावधान अवधारा ॥२२॥ चौ बाणीं सारथी सत्तरीं रथी । एक सहस्र बाणीं यमाप्रती । वर्मांग लक्षोनि निशाचरपती । विंधिता झाला ते समयीं ॥२३॥ येतां रिपूचे बाण । यमराजें तोडिले न लागतां क्षण । जैसें सूर्योदयीं तमाचें ठाण । नव्हतेंचि जाण गगनीं हो ॥२४॥ याउपरी वैवस्वत । क्रोधाच्या उकळ्या सांडित । भासत झाला पावकवत्[8] । सुरनरांच्या नेत्रांसी ॥२५॥

---

शब्दार्थ - १. रथ, २. यमराज, ३. समरांगणावर, ४. रावण, ५. इंद्राचा घोडा, ६. सूर्यपुत्र (यम) ७. मेघांचें, ८. अग्नीसारखा

**शत्रुनाश करण्याची मृत्यू यमाकडे आज्ञा मागतो :** क्रोध आलिया यमासी । तंव मृत्यु उभा संमुख करी विनंतीसी । म्हणे राया मजलागीं आज्ञेसी । दीजे युद्धासी करावया ॥२६॥ माझी पडलिया दृष्टी । हे आटेल सकळ सृष्टी । मज न लगे युद्धाची अटाटी । माझी गोष्टी अवधारा ॥२७॥ मज सोडावें लवकरी । रिपु मारीन रणसागरीं । नरकासुर क्षणाभीतरीं । म्यां वधिला भारी निजांगें ॥२८॥ माझें स्वरूप हें हरिहर । माझें स्वरूप ब्रह्मा इंद्र । माझे स्वरूप श्रीरामचंद्र । राक्षससमुद्र शोषूं पाहे ॥२९॥ हे समस्तही निमित्तधारी । मी मृत्यु जगाचा संहारकारी । जे जन्मले प्राणी संसारीं । त्यातें मारीन त्वरेंकरीं ॥३०॥ शंबर वृत्र आणि शुंभ । सहस्रार्जुन निशुंभ । नमुचि विरोचन मधुकैटभ । यांचे प्रतापाची बोंब त्रिभुवनीं ॥३१॥ हे मारिले आणिकही बहुत । निर्दळिले म्यां संख्येंरहित । यादव कौरव हे समस्त । माझेनिच निश्चित निमाले ॥३२॥ मजसारिखा सेवक । तुज चिंता कायसी एक । मज सोडिल्या निमेष एक । न लागतां सकटक[1] रिपु मारीन ॥३३॥ माझिये दृष्टीं पडिले प्राणी । ते न वांचती सत्यवाणी । मज सोडिता तेच क्षणीं । संहारीन ब्रह्मांड ॥३४॥ ऐसें मृत्यूचें वचन । धर्मराजें ऐकोन । म्हणे मृत्यु तूं नको मीच मारीन । पुढील निरूपण ऐकावें ॥३५॥

**मृत्यूला नकार देऊन काळदंड हाती घेतला :** तदनंतर प्रेतनाथ । करूनि नेत्र आरक्त । काळदंड घेवोनि त्वरित । तोलिता झाला अद्भुत करतळीं ॥३६॥ जयाच्या पृष्ठभागीं असती । भाते भरले बाणीं वज्रतुल्य निगुतीं । पावकसमान मुद्गर अरिमर्दनार्थी । प्रतिष्ठिला अति घोर ॥३७॥ जयाचिये रथीं जाण । चाप ठेविलें काळासमान । पुटपावकाचे तेजें गगन । दशदिशा धवळल्या ॥३८॥ यशाचिये रथीं संमुख । मुद्गर[2] ठेविला काळांतक । दर्शनें जीवमात्र देख । अपधाकें मरताती ॥३९॥ दर्शनें प्राणी संहारी । तो सोडिला जीवांवरी जरी । तरी तयाची काय उरेल उरी । देखोनि वैरी कांपिजे ॥४०॥ तो परिघ घेता करीं । तयाची दीप्ति फांके अंबरीं । ज्वाळा वेष्टित सहपरिवारीं । दर्शनें वैरी मद गळित ॥४१॥ ऐसा परिघ अति दारुण । यमराज स्पर्शूनि जाण । सोडी तंव राक्षससैन्य । त्वरान्वित पळतें झालें ॥४२॥ सुरासुर भयभीत । पृथ्वीचे जन चळीं कांपत । त्या दंडाचें प्रेरण करून हात । ऊर्ध्व टाकिला रावणावरी ॥४३॥ तया समयीं वैवस्वत । दंड प्रेरितां उठे अनर्थ । हा प्रळय अकल्पित । ओढवला म्हणत जनलोक ॥४४॥

**ब्रह्मदेवाचे यमाला आवाहन :** तेचि अवसरीं प्रजापती । बोलता झाला गा महामूर्ती । अहो जी प्रेतराज दक्षिणपती । वचन माझें निश्चितीं ऐकावें ॥४५॥ ब्रह्मा म्हणे प्रेतपती । ऐक माझी वचनोक्ती । तुझेनि दंडें निशाचरपती । क्षणें भस्मांतीं जाईल ॥४६॥ पैल पाहें रणा उजु । दहा शिरें वीस भुजु । तोचि जाण लंकेचा नृपराजु । ठाण मांडोनि उभा असे ॥४७॥ पूर्वी तया रावणासी । म्यां वर दिधला निश्चयेसीं । माझेनि वरदें सुरासुरांसीं । त्रासिलें येणें राक्षसें ॥४८॥ आता यमा मुद्गरेंकरून । नको करूं रावणाचें हनन । माझे वचन अप्रमाण । हा मरतां होऊं पाहे ॥४९॥ आणि भविष्य वाल्मीकाचें । असत्य होऊं पाहे साचें[3] । तरी आतां ये काळींचें । वाक्य आमुचें तुवां मानावें ॥५०॥ मुद्गर मजपासोनि जनित । तो तुज दिधला युद्धार्थ । तेणेंकरोनि लंकानाथ । न मारीं ये रणमंडळीं ॥५१॥

**ब्रह्मवचन प्रमाण मानून रावणाला न मारता यम निघून गेला :** ऐसें ऐकोनि ब्रह्मवचन । प्रतिउत्तर दे धर्मराज आपण । म्हणे स्वामी न करिता हनन । हा उगा कैसा राहेल ॥५२॥ यासि वधीन

---

शब्दार्थ - १. सैन्यासह, २. आयुधविशेष, ३. सत्य, खरोखर.

क्षणाभीतरीं । परी आज्ञा तुमची शिरीं । म्हणोनि मुद्गरातें सांवरी । ते समयीं प्रेतराज ॥५३॥ ऐसें बोलोनि प्रजापतीप्रती । सर्वे घेवोनि रथ सारथी । नारदासहित ऊर्ध्वगती । स्वर्गासी निघाला ॥५४॥ तंव येरीकडे दशानन । यमराज गेला देखोन । जिंतिलें म्हणोनि श्लाघ्यवचनें। करी गर्जना आनंदें ॥५५॥ पुष्पकीं आरूढोनि लंकापती । यमसदनींहूनि पुढतीं । चालिलासे रसातळाप्रती । तें सावध श्रोतीं अवधारिजे ॥५६॥ एका जनार्दना शरण । म्हणतां गेलें एकपण । एका एकपणा वांचून । रामायण लिहिलेंसे । स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां यमविधातृसंवादो नाम षड्विंशतितमोऽध्यायः ॥२६॥ ओंव्या ॥५७॥

## अध्याय सत्ताविसावा

॥ श्रीगणपतये नमः ॥

### रावणाचे मुंडन करून विटंबना

पूर्वकथानुसंधान । धर्मराजा शीघ्र स्वर्गगमन । समागमें नारद भगवान । देवसदन पावला ॥१॥ येरीकडे पुरंदरारिजनक[१]। राक्षासांमाजि श्रेष्ठ नायक । पुष्पकीं आरूढोनि लोका-लोक । क्रमूनि रसातळा येता झाला ॥२॥ घायीं राक्षस जर्जरीभूत । मार्गी एकमेकां उपचारित । देवांमाजि बळी प्रेतनाथ । जिंतोनि त्यातें चालिला ॥३॥ सर्वे प्रधान शुकसारण । मारीच अकंपन प्रहस्त जाण । आणिकही बळियाढे गहन । देवदर्पहरण राक्षस ॥४॥

रावणाचे पाताळांतील भोगावती नगरीला आगमन : ऐसे प्रधानांसहित । पुष्पकारूढ लंका-नाथ । तंव पुढें रसातळ लोकांतें । देखते झाले राक्षस ॥५॥ तया रसातळामाझारीं । वरुण नाग सहपरिवारीं । आणिक दैत्य नानापरी । वसती तया नगरीं हो ॥६॥ तया नगरीचें अभिधान । भोगावती नामें गहन । अति रम्य विश्रांति-स्थान । ऋषि मुनिगण वसती जेथें ॥७॥ सुवर्णभित्ति आणि मंदिरें । सुवर्णांच्या आटोळ्या गोपुरें । सर्व नरां सुवर्णांची घरें । तोरणें मखरें घरोघरीं ॥८॥ हाट[२] हटवटिया चौबारें[३] । तेथें नांदिजे धनवत्तरें । घरोघरीं मंगळतुरें । नाना वाद्यें वाजती ॥९॥ ऐसिया नगराप्रती । येता झाला लंकापती । सर्वे प्रधान भद्रजातीं[४] । दृष्टीं नाणिती कळातें ॥१०॥

निवातकवचाशी रावणाचे युद्ध : तया नगरींचे वीर । निवातकवचनामें दुर्धर । जयांचा धाक वाहे सुरेंद्र । सामान्य इतर कोणीकडे ॥११॥ ऐसिया वीरांप्रती । समरांगणीं राक्षस भिडती । उभयतां शस्त्रें वर्षती । एकमेकां लक्षून ॥१२॥ एकमेकांवरी वर्षती बाण । एकमेकांवरी सांडिती पाषाण । एक तें शस्त्रें नाना दारुण । वैरी लक्षोन विंधिती ॥१३॥ ऐसें करिती घोरांदर[५] । राक्षस आणि ते विखार[६] । समारांगणीं समान वीर । हार जित[७] न घेती ॥१४॥ एक संवत्सरपर्यंत वीर । युद्ध करिती अति दुर्धर । शिणले नाहींत परस्पर । जयो इच्छिती आपणिया ॥१५॥

ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून निवातकवचांनी रावणाशी मैत्री केली : निवातकवच आणि रजनी-चर । युद्ध करितातीं घोरांदर । तें निवारावया सावित्रीवर । ऐकोनि येता जाहला ॥१६॥ विमानारूढ सावित्रीरमण । त्रैलोक्याचा स्वामी आपण । जेथें राक्षसां विखारां समरांगण । तेथें येता झाला प्रजापति ॥१७॥ विधाता म्हणे तयांसी । तुम्ही युद्धीं अशक्त राक्षसांसी ।

शब्दार्थ - १. इंद्रजिताचा जनक (रावण), २. बाजार, ३. चवाठे, ४. हत्ती, ५. निर्वाणींचें युद्ध, ६. सर्प, ७. जय.

समरांगणीं भिडतां तुम्हांसी । राक्षस मारिती निजबळें ॥१८॥ वरदबळें हे रजनीचर । उन्मत्त झाले महाथोर । इहीं जिंतोनि सुरासुर । निधडे वीर मारिले ॥१९॥ रावणेंसीं मैत्री कीजे । माझिया बोला मान दीजे । तरीच तुम्ही कल्याण पाविजे । नातरी जाइजे मरणमार्गे ॥२०॥ ऐकोनि ब्रह्मयाचें वचन । निवातकवच वीर मिळोन । रावणासीं मैत्री जाण । न लागतां क्षण पैं केली ॥२१॥ साक्षी अग्नि ब्राह्मण । सुर असुर देवगण । राक्षस विखार एक होऊन । सुखसंपन्न राहिले ॥२२॥ तदनंतर पुलस्तिसुत । पूजा तयांची घेवोनिं तेथ । राहिला एक वर्षपर्यंत । सुखें स्वस्थ होऊनी ॥२३॥ माया कपटविद्या पूर्ण । जारण मारण मोहन स्तंभन । उच्चाटन वशीकरण । अतर्क्य कपटमंत्र दारुण । एक शत अभ्यास करी ॥२४॥

**रावणाचे वरुणाच्या अश्मपुरीला आगमन :** मग तो राक्षसचूडामणी । चालिला पाताळ शोधोनी । तंव पुढें देखिलें नयनीं । वरुणाचें निजनगर ॥२५॥ अतिरम्य महा सुंदर । सुवर्णाचें ते नगर । तया नाम अश्मपुर । विखार नांदति तेथें ॥२६॥ काळयाचे ते जाती । विखार आपुलेनि बळें नांदती । तयांतें मरोनि लंकापती । पुढें चालिला सत्वर ॥२७॥ तयावरी शूर्पणखेचा भ्रतार । तयासीं युद्ध केलें थोर । तयातें मारोनि सत्वर । मग पुढारां चालिला ॥२८॥ तेथें खळ आणि बळवंत । तिसरा विद्युज्जिव्ह चवथा बळोत्कट । आणिकही बलाढ्य चार शत । दैत्य तेथ मारिले ॥२९॥ तदनंतर पौलस्ती । पुढें चालिला तंव शुभ्रदीप्ती । कैलासासम श्वेतज्योती । वरुणालय देखिलें ॥३०॥ तया मंदिरासि उपमा पूर्ण । द्यावयासि एक कैलास समान । अति दिव्य शोभे गहन । वरुण आपण नांदे तेथें ॥३१॥ तया वरुणाचें मंदिरीं । कामधेनु बांधिली स्रवे[१] क्षीरीं[१] । तया क्षीराचा प्रवाह सागरीं । म्हणोनि क्षीरसागर बोलिजे ॥३२॥

**वरुणाच्या कामधेनूला पाहून रावण प्रसन्न :** त्या धेनूचें स्रवतां क्षीर । तयाचा झाला क्षीरसागर । धेनु देखोनि आनंद थोर । लंकेश्वरा जाहला ॥३३॥ जया धेनूचें वाहतां क्षीर । तयाचा झाला क्षीरसागर । तेथें जन्मला हिमकर[२] । आर्त[३] चकोरां निववीत ॥३४॥ तेथोनि जन्मलें अमृत । तेणें सुरवर तृप्त होत । म्हणोनि सुरभि ऐसें म्हणत । ज्ञाते पंडित तियेसी ॥३५॥ कामधेनु कां म्हणती । ऐसें आक्षेपिजेल[४] श्रोतीं । तरी आयका तेचिं अर्थीं । सावधान श्रोतीं होइजे ॥३६॥ कामिकाचे पुरवी काम । तियेचेनि देवा तृप्ति परम । म्हणोनि कामधेनु ऐसें नाम । तियेसीच पैं राजे ॥३७॥ सकळ देव जिचेनि जिती । सकळांचें जीवन जे निश्चितीं । म्हणोनि कामधेनु ऐसें बोलती । याचि कारणालागुनी ॥३८॥ ऐसिये धेनूतें देखोनी । रावणें प्रदक्षिणा करोनी । साष्टांग नमनें अभिवंदोनी । पुच्छ नेत्रीं लाविलें ॥३९॥ पुढें तो मंदोदरीकांत । चालिलासे त्वरान्वित । वरुणाचें गृह सुशोभित । वीर बळवंत देखिले तेथें ॥४०॥ तयांतें गांजोनि म्हणे रावण । जा रे सांगा वरुणाप्रति जाऊन । अजित वीर दशानन । युद्धालागून आलासे ॥४१॥ तयासीं युद्ध कीजे । नाहीं तरी हरविलें म्हणिजे । ऐसें सांगोनि राक्षसराजें । वरुणाच्या दूतां पाठविलें ॥४२॥ दूत आला वरुणपुत्रापासीं । म्हणे गांजिलें राया राक्षसीं । युद्धा पाचारितो तुम्हांसी । शीघ्रतेसीं जाइजे ॥४३॥

**वरुणाचें रावणाशीं युद्ध :** दूताचें ऐकोनि वचन । कोपा चढला वरुणनंदन । म्हणता झाला पालाणा[५] रे सैन्य । युद्धा रावण आलासे ॥४४॥ मग त्या वरुणाचे पुत्र पौत्र । तिहीं पालाणिले आपुले रथ । एक वृषभीं आरूढ होत । एक चालत पैं पायीं ॥४५॥ वरुणसैन्य समस्त

---

शब्दार्थ - १. दूध देत असे, २. चंद्र, ३. पीडित, ४. शंका घेतील, ५. तयार करा.

मिळोन । करितें झालें घोर रण । रावणें समस्तां त्रासून । बळक्षीण पैं केलें ॥४६॥ रावणाचे प्रधानीं तिहीं । संग्राम केला तिये ठायीं । वरुणसैन्य त्रासिलें पाहीं । समरांगणामाझारीं ॥४७॥ सलिलेंद्रसैन्य[1] विकळ पडिलें । रथेसीं आकाशांत पळतें झालें । तेथोनि संग्राम करूं लागलें । रावणावरी शस्त्रवृष्टीं ॥४८॥ रावणाच्या रथावरी । शस्त्रवृष्टी झाली भारी । जैशा अंबुधारा[2] शैलावरी । तैसा राक्षस वेढिला ॥४९॥ जैशा बहुत मिळती पिपीलिका[3] । वेढिती उरगनायका[4] । तैसें तोयेंद्रसैनिकीं दशमुखा । रथेसहित वेढिलें ॥५०॥

**महादराकडून वरुणसैन्याचा पराभव :** देती हाका करिती गर्जन । म्हणती जिंतिला दशानन । हें देखोनि महोदरें जाण । काय केलें ते समयीं ॥५१॥ तया महोदरें ते समयीं । गदा घेतली काळतुल्य पाहीं । मिसळला संग्रामाच्या ठायीं । वरुणसैन्य मारित ॥५२॥ वरुणसैन्य पाडोनि रणीं । सिंहनाद करी गर्जोनी । वैरी विरथ पाडिले मेदिनी । अशुद्ध वाहे भडभडां ॥५३॥ असो अद्भुत संग्राम झाला । वीरें वीर रणा आला । सर्व संपत्तीतें मुकला । जयो पावला महोदर ॥५४॥ मग त्या वरुणाचे पुत्र । आकाशींहूनि पाहत । सैन्य देखोनि हताहत । मग तवका चढले हो ॥५५॥ अनेकशस्त्रसंभार । टाकिते झाले लक्षोनि निशाचर । मग कोपला राक्षसेंद्र । शर अपार वर्षला ॥५६॥ न माती आकाशपृथ्वीवरी । ऐसे शर वर्षला वैश्रवणारी । वर्म लक्षोनियां वैरी । भूमीवरी पाडिले ॥५७॥ कित्येक मुसळेंकरून । कित्येक पट्टिशें जाण । कित्येक शक्ति सोडोन । वरुणनंदन मारिले ॥५८॥ मारोनियां वरुणपुत्रांतें । विजयी झाला रावण तेथें । प्रधान करिती सिंहनादातें । जैसा प्रळयीं मेघ हो ॥५९॥ तदनंतर दशानन । वरुणालयाप्रति जाण । येवोनि बोलता झाला आपण । सावधान अवधारा ॥६०॥ रावण वरुणप्रधानासी । म्हणे सांग प्रहासा वरुणापासीं । राक्षसेंद्रें मारिलें तुझ्या पुत्रांसी । आता तुजसीं युद्ध करूं पाहे ॥६१॥ तंव तो प्रहास प्रधान । ऐकोनि रावणाचें वचन । म्हणता झाला तेथें नाहीं वरुण । ब्रह्मलोका गेलासे ॥६२॥ जळेश्वर[5] ब्रह्मलोकाप्रती । गेलासे जाण निश्चितीं । बलिष्ठ हाते ते समाप्तीसी[6] । तुझेनि हातें पावले ॥६३॥ प्रहास प्रधान मधुर वाचा । बोधविला तेणें राजा लंकेचा । पुढील अन्वय[7] कथेचा। सावधान ऐकिजे ॥६४॥ ऐकोनि प्रहासाचें वचन । मग तो पौलस्तिनंदन । पुष्पकीं आरूढोनि जाण । बळिभुवना जाता झाला ॥६५॥

**राम-अगस्ती संवाद :** श्रीदाशरथी म्हणे महामुनी । तुमचे प्रसादें पुण्यपावनी । कथा ऐकिली रामायणी । भवतारणी निजगंगा ॥६६॥ जैसें गौतमाचेनि प्रसादें । त्रैलोक्यें भोगिजे सायुज्यपद[8]। जेंवी शिबीचें पुण्य अगाध । ग्रामस्थांसी उत्तम गति ॥६७॥ जेंवी समर्थाचेनि लग्नीं । मिष्टान्न अकिंचनीं तेंवी तुमचे वचनीं । माधुर्यता काय सांगूं ॥६८॥ पुढील कथानुसंधान । काय करिता झाला रावण । तें मजप्रती समूळ कथन । सांग संपूर्ण निवेदिजे ॥६९॥ ऐसीं श्रीरामाचीं शब्दकुसुमें । श्रवणीं लेवोनि द्विजसत्तमें । आनंदें उल्लासोनी परम । काय वचन बोलिला ॥७०॥ कुंभोद्भव म्हणे अवनिजापती । तूं देवाधिदेव वर्णिला श्रुतीं । अष्टादश पुराणें तुज नेणती । तेथें मी किती बापुडें ॥७१॥ जननीवोसंगा बाळक वाढे । तेणें मातेचा महिमा नेणिजे मूढें । तैसे आम्ही ब्राह्मण वेडे । तुज मानव म्हणतसों ॥७२॥ पद्मिनीसन्निध बिढार । घेवोनि राहिला दर्दुर[9] । सुवास नेणेचि पामर । भोक्ता मधुकर[10] तेथींचा ॥७३॥ अंधागृहीं लाविल्या दीपकोटी । नपुंसका पद्मिनी गोमटी । नारी जोडली तरी शेवटीं ।

---

**शब्दार्थ -** १. वरुणसैन्य, २. पर्जन्यधारा, ३. मुंग्या, ४. सर्पराजाला, ५. वरुण, ६. मृत्यू, ७. संबंध, ८. मोक्ष, ९. बेडूक, १०. भ्रमर.

उपयोगासी पैं नव्हे ॥७४॥ तैसें श्रीरामा तुझें चरित्र । नेणती मतिमंद अपवित्र । तो तूं आम्हापुढें विचित्र । कथा पुससी राजेंद्रा ॥७५॥

रावणाचे बळीच्या नगरीला आगमन व त्या नगरीचे वर्णन : तरी अवधारीं गुणसंपन्ना । रावण जिंतोनियां वरुणा । प्रवेशला पाताळभुवना । प्रहस्त प्रधानासमवेत ॥७६॥ सुतळीं रावण प्रधानासहित । चालिला पुढें अपूर्व अद्‌भुत । नगर देखोनियां विस्मित । प्रधानासी बोलिला ॥७७॥ जेंवी देवेंद्र गुरुप्रती । प्रश्न करी एकांतीं । तेवीं रावण प्रधानासीं युद्धीं । बोलता झाला ते समयीं ॥७८॥ रावण म्हणे गा प्रधाना । देखोनि नगरीची रचना । अपूर्व वाटलें माझिया मना । येथील राजा कोण असे ॥७९॥ देखोनि नगरीची रचना । उणें आणिलें शचीपति-भवना । सत्यलोक ईपुढें ठेंगणा । माझिया दृष्टीसी कल्पत ॥८०॥ अलका आणि द्वारका । पाहतां इच्या न ये तुका । जेथें वास कैलासनायका । त्याहूनहि अपूर्व ॥८१॥ नगरी परिवेष्टित सप्तयोजनें । कल्प तरूंची उद्यानें वनें । सरोवरगणना करील कोणे । देउळांतें मिती नाहीं ॥८२॥ ठायीं ठायीं आम्रवनें । स्थळोस्थळीं शिवस्थानें । नानापरींच्या वाटिका सुमनें । मार्गस्थांतें सुवास देती ॥८३॥ जैसी यौवनें सुंदरी। तरुणपणें न माय अंबरीं । तैशा वल्ली नानापरी । दिव्यौषधींच्या शोभती ॥८४॥ रत्नकळस विराजमान । ठायीं ठायीं पताका गहन । नगरीं लोक पुण्यपावन । धार्मिक जन वसती तेथें ॥८५॥

रावण चौकशीसाठी प्रहस्ताला नगरीत पाठवितो : हे कोणें पाळिली नगरी । प्रहस्तां आंत जावोनि झडकरी । अभिप्राव मनामाझारी । आणोनियां मज सांगें ॥८६॥ त्र्यंबक जेंवी तारकारीप्रती[1] । सांगे महत्प्रयोजनाची वदंती । तेंवी ते समयीं मंदोदरीपती । आज्ञापित प्रधाना ॥८७॥ रावणाचें प्रत्युत्तरवचन । ऐकोनि प्रहस्त प्रधान । नगरामाजि प्रवेशतां गर्जन । निजानंदें पैं केलें ॥८८॥

प्रहस्ताची दारातच तेजःपुंज वामनाची भेट व त्याला प्रश्न : प्रधान प्रवेशतां नगरीं । प्रथमद्वारीं ब्रह्मचारी । देखिला वामन सालंकारी । सुवर्णमाळा कंठीं असे ॥८९॥ श्यामसुंदर विराजमान । माथां मुकुट तेज गहन । तयाचें दीप्ती पाताळभुवन । प्रकाशपूर्ण भासत ॥९०॥ भाळीं मृगनाभि[2] ललाटीं । मलयजचंदनांची[3] शोभे उटी । आजानुबाहु जगजेठी । कुंडलें गोमटीं झळकती तेजें ॥९१॥ शोभे पीतांबर वसन[4] । दक्षिणागीं द्विजचरण । सकलालंकारांचें मंडण । ऋषि मुनि वंदिती ज्यातें ॥९२॥ ऐसा पुरुष प्रथमद्वारीं । प्रहस्त देखोनि प्रश्न करी । म्हणे हे कोणी पाळिली नगरी । येथील राजा कोण असे ॥९३॥ सांगा तयाचें अभिधान । ऐसें प्रहस्तमुखींचें वचन । ऐकोनि बोलिला श्रीवामन । सावधान निजवृत्ती ॥९४॥

वामनाने सांगितलेली बळीराजाची माहिती प्रहस्ताकडून कळताच रावण त्याच्या भेटीला गेला : वामन म्हणे गा रजनीचरा । ऐकें सावधान चतुरा । ये सुतळीं वास दैत्येश्वरा । अभिधान राजा बळि असे ॥९५॥ तेथें वसती धार्मिक जन । येथील राजा बळि बळवान । जयासि भीती सुरासुरगण । द्वारीं भगवान जयाच्या ॥९६॥ महापुरुषाची ऐकोनि मात । धांवोनियां प्रधान प्रहस्त । जेथें होता लंकानाथ । तया वृत्तांत जाणविला ॥९७॥ अपूर्व प्रधानमुखींची उत्तरें । परिसोनियां लंकेश्वरें । हात जोडून पुढारें । प्रथमद्वारा पैं आला ॥९८॥ जेंवी निधानासन्निध विवसी । मांत्रिकापुढें भूतें जैसीं । तैसा रावण प्रधानेंसीं । वामनापासीं पैं आला ॥९९॥

---

शब्दार्थ - १. कार्तिकस्वामीला, २. कस्तुरी, ३. मलयपर्वतावरील चंदनाची, ४. वस्त्र.

द्वाररक्षक वामनाला नमस्कार न करताच त्याला युद्धाचे आव्हान कळविण्यास रावणाने सांगितले : राक्षसें देखोनि वामन । न करीं प्रणिपात नमन । जैसा दरिद्री निधान । डावलोन जातसे ॥१००॥ जयविजय सनत्कुमारांसी । नोळखतां झाले परम क्लेशी । च्यवोनियां दैत्ययोनीसीं । जन्मोनि मरणासी पावले ॥१॥ तैसें रावण ते समयीं । प्रणिपात न करोनि कांहीं । बोलता झाला युद्धालागीं पाहीं । त्रैलोक्य जिंतोनि मी आलों ॥२॥ द्वारीं उभा असें तिष्ठत । बळीस वेगीं जाणवीं मात । युद्धा पाचारितों त्वरित । ऐसा वृत्तांत जाणवीं ॥३॥ वामन म्हणे रावणासी । तुम्हींच जावें बळीपासीं । हे वार्ता जाणवा तयासी । निजमुखेंकरोनियां ॥४॥ मी असें तयाचा द्वारपाळ । येथें बैसोनियां सकळ । रक्षितों क्षितिमंडळ । आज्ञाधारक मी त्याचा ॥५॥

वामनाच्या अनुज्ञेने रावण स्वतःच बळीजवळ गेला : वामनमुखींचें ऐकोनि वचन । भीतरीं प्रवेशला दशानन । सप्तद्वारें उल्लंघोन । राजद्वारा पैं आला ॥६॥ भद्रासनीं बळि भूपती । अर्धांगी संध्यावळी सती । परिवेष्टित सेनासंपत्ती । तंव रावणातें देखिलें ॥७॥ देखोनि रावण दशमुखांचा । समस्त अवलोकोन बोलती वाचा । म्हणती हा बहु आननांचा । कोठोनि कैंचा येथें आला ॥८॥ कीं हें दशमुखांचें किडें । कीं हें दशानन श्वापद गाढें । कीं हें दशग्रीवांचें पक्षी चोखडें । राजभेटी आणिलें कोणीं ॥९॥ ऐसे तर्क नानापरी । करितां जनीं ते अवसरीं । पुढें तो रावण राजसदनाभीतरीं । येता झाला तत्काळ ॥११०॥ येवोनि बळिरायासमीप । उभा रावण धरोनि कोप । मनीं विचारी बळीचा गर्वदर्प । झाडणी करीन समस्तांदेखतां ॥११॥ मज नेदीच मान्यता मान । न बोलावें ऐसें बोले वचन । याचे अंगीं बलाभिमान । मजकडे नयनें न पाहे ॥१२॥ ऐसी रावणहृदयींची व्यवस्था । कळों सरली सुतळनाथा । सरिसाच राजा बोलता । झाला तया राक्षसासी ॥१३॥

बळीच्या प्रश्नावरून रावण स्वमहिमान सांगून युद्धाचे निमित्त सांगतो : बैसा अहो जी राक्षसेश्वरा । तुम्ही कोण कोणाचे समाचारा । येथें यावयाचे कारणविस्तरा । मजप्रति सांगावें ॥१४॥ रावण म्हणे मी पौलस्तिकुळदीपक । सकळ राक्षसांचा नायक । जिंतोनियां तिन्ही लोक । येथें युद्धासि देख पैं आलों ॥१५॥ मजसीं करावा संग्राम। म्यां जिंतिले सुरासुर परम । शचीपतीचें हरोनि धाम । राक्षसांसी दिधलें ॥१६॥ बळि म्हणे राक्षसनाथा । परिस माझी राज्यकथा । मजसीं युद्ध न घडे सर्वथा । पर उपाय आतां सांगतों ॥१७॥

द्वाररक्षक वामनाशी युद्ध करण्यास बळी सांगतो, रावणाला आश्चर्य वाटते? : प्रथमद्वारीं पुरुषपंचानन । तयासीं युद्ध करावें आपण । येरु म्हणे द्वारपाळ दीन । तयासी युद्ध काय करूं ॥१८॥ जेथें पंचाननाचें गर्जन । तेथें ऐरावतीचे फडफडती कान । कोणे उपमे योग्य कोण । नेमितोसि अरे राया ॥१९॥ जी गर्दभ उन्मत्त बहुसाळ । तरी काय युद्धीं शार्दूळ । जिंतील हा विपरीत काळ । कैसा घडेल राजेंद्रा ॥१२०॥ कमळकोशींचा षट्पद । काय उपडील मेरूचा कंद । ऊर्णनाभितंतुरुद्ध[1] । गज काय गुंतोनि राहील ॥२१॥ जरी झाला मशक थोर । तरी काय ग्रासील वैश्वानर । पिपीलिकेनें गिरिवर । केवीं माथां धरवेल ॥२२॥ अंधाचा महा अंध सुत । स्वयें अडखळोनि कूपीं पडत । तेणें धरोनि मार्गस्थाचा हात । पंथीं लावील निजनेटें ॥२३॥ हें केवीं घडे जें न घडे । मशकपांखीं मेरू उडे । दानवें[2] उभारोनि फडे । शेषासी वाद करूं आलें ॥२४॥ तें द्वारपाळ बापुडें दीन । मी लंकेचा राजा रावण । बधिलिया

शब्दार्थ – १. कोळ्याच्या सुतानें बांधिला गेलेला, २. काडू.

पराक्रम कोण । माझा होईल बळिराजा ॥२५॥ ऐसें हें कैसें घडेल राया । मजसीं युद्धा द्वारपाळा तया । प्रेरितोस हा विचार वांया । साच कैसा घडेल ॥२६॥

रावणाची हास्यास्पद गर्वोक्ती ऐकून बळीने वामनाची महती रावणाला सांगितली : दशमुखींची वचनावळी । ऐकोनियां राजा बळी । बोलता झाला तये काळीं । मूर्खाप्रति सुबुद्धि जैसा ॥२७॥ ऐक वत्सा दशानना । तूं नेणसी त्याच्या महिमाना । ऐकसी तरी सावधमना । मसूळ कथना सांगतों मी ॥२८॥ तयाचिया सत्तामात्रें । सृजती[1] अंडज[2] जारजादि[3] भूतें । सृष्टिकर्ता विधाता त्यातें । पुत्र केला पोटींचा ॥२९॥ सकळ सृष्टीचा जो कर्ता । तो आत्मज त्याचा विधाता । तो अवतारपुरुष तत्वतां । सत्य लंकानाथा मानावें ॥१३०॥ चतुर्दशभुवनांचा ईश्वर । कर्ता संहर्ता सर्वेश्वर । तेणें मानवरूपें अवतार । धरिला असे गा पौलस्त्या ॥३१॥ धरा भारें पीडोनी । शरण गेली त्यालागोनी । मग तो आपण शाङ्‌र्गपाणी । अवतार धरिता पैं झाला ॥३२॥ वेदानिमित्त विधात्यानें । प्रार्थना केली दीनवदनें । मग मत्स्यावतार धरोनि तेणें । शंखासुर निर्दळिला ॥३३॥ दैत्यें पृथ्वी नेली पाताळा । तैं सुरीं प्रर्थिलें घननीळा । तिच्या कैवारा अवतरला । कूर्मरूपें जनार्दन ॥३४॥ पृथ्वी धरी पृष्ठीवरी । म्हणोनि कूर्म म्हणती अद्यापवरी । सर्वेचि वराहरूपें श्रीहरी । हरिण्याक्षा मर्दिलें ॥३५॥ दैत्यें गांजिलें पुत्रातें । त्याच्या कैवारा अवतरला तेथें । स्तंभ भेदोनि हिरण्यकशिपूतें । विदारिलें जानूंवरी[4]॥३६॥ माझ्या अभिमानें मज केवळ । नाडिलें गा करोनि छळ । दातेपणाच्या थोरीनें प्रबळ । न मायेचि तिहीं लोकीं ॥३७॥ माझ्या अभिमानाची देखोनि थोरी । मग हा वामनरूपें झाला हरी । छळणा करोनि कपटकरी । यज्ञद्वारा पैं आला ॥३८॥ बटुवेष धरोनि जाण । मग मागितली भूमि पाद तीन । पाठीवरी देवोनि चरण । पाताळभुवनीं लोटिलें ॥३९॥ कपट त्याचें त्यास फळलें । माझें घरीं द्वारपाळ झालें । गळा बांधोनियां राहिलें । अद्यापवरी द्वारासीं ॥१४०॥ पुढील त्याचा कैसा पवाडा । कामधेनूनिमित्त केला झाडा । सहस्रार्जुनाचे बाहूंचा सडा । रणांगणीं घातला तेणें ॥४१॥ तोचि पुरुष सूर्यवंशीं । अवतरेल राक्षसकुळांत करावयासी । पौलस्तीचे कुळवल्लीसी । भस्म करावयालागून ॥४२॥ तोचि अवतरोनि गवळ्याघरीं । पूतना शोषोनि काक बक मारी । रिठासुरासी दाढेभीतरी । चघळिलें पूगीफळ जैसें ॥४३॥ तेणें दावाग्नि प्राशिला । धेनुक वत्स उपटिला । विमलार्जुन उन्मळिला । रांगत रांगत बाळरूपें ॥४४॥ जरासंध काळयवन । दंतवक्त्रशिशुपाळादि जाण । मुष्टिक चाणूर मल्ल मर्दून । कंसनिर्दळण मामाचें ॥४५॥ यम कुबेर वायु ईशान । हे त्याचे वंदिती चरण । तो हा आदिपुरुष नारायण । द्वार रक्षोन बैसलासे ॥४६॥ कांळासी जयाचा महाधाक । जयाचे तेजें सूर्यशशांक । अष्ट दिक्पाळ सेवक । सेवन करिती जयाचें ॥४७॥ त्यासीं युद्ध जाय करी । बळीनें अज्ञापिलें ते अवसरीं । हे ऐकोनि तो सुरारी । काय बोलता जाहला ॥४८॥

रावणाच्या गर्वोक्तीची बळीकडून उपेक्षा : जो हा काळरूप यम जाण । दंडें त्रैलोक्या करी दमन । त्यासीं युद्ध आपण । अवश्यमेव करावें ॥४९॥ निजदंडें पातक्या दंडी । तयावरी म्यां घातली धाडी । राज्यासहित देशोधडी । म्यां केला बळिराया ॥१५०॥ ऐसी रावणाची वचनावळी । ऐकोनियां राया बळी । उपेक्षा करोनि तयेकाळीं । सारिपाट आणविला ॥५१॥

---

शब्दार्थ – १. उत्पन्न होतात, २. पक्षिसर्पादि, ३. मनुष्यादि, ४. मांडीवर घेऊन.

रत्नमंचकावरी जाण । विंध्यावळी राजा दोघे जण । सारिपाट खेळती पार्श्वभागीं रावण । परम कोपें खवळला ॥५२॥ बळी न मानीच तयासीं । जेंवी ज्ञाता पाखांडियासी । रवि जेंवी शर्वरीसी[1]। तैसें झाले रावणा ॥५३॥ राजहंस नातळे शेणा । तापसी न पाहे स्त्रीरत्ना । निष्कामासी धनतृष्णा । तेंवी उपेक्षा रायें केली ॥५४॥ गंगेनें त्यजिलें पाप । ज्ञाता सांडी हृदयकोप । निष्पत्र जाणोनियां पादप[2]। पक्षियें वर्जिला पैं जैसा ॥५५॥ साधु जेंवी त्यजिती निंदा । ब्रह्मचारी नातळे प्रमदा । ब्रह्मनिष्ठ हर्षविषादा । न येतीच कल्पांतीं ॥५६॥ चातक नातळे आणिक जीवन[3]। चकोर न सेवी अमृतावांचून । दुर्भिक्षें पीडिला शार्दूळ तृण । न सेवी हो देहत्यागें ॥५७॥ ऐसियापरी दैत्यनाथें । उपेक्षोनियां रावणातें । खेळतां स्तब्ध झाला चित्तें । देहभावार्थ विसरोनी ॥५८॥

खेळातील निसटलेला फासा आणावयास बळीने रावणाला सांगितले : सारीपाट खेळतां दोघां जणां । फांसा निसटला तो आणीं रावणा । ऐसें ऐकोनि दशानना । कोप परम उद्भवला ॥५९॥ म्यां जिंतिले सुर समस्त । बाहूनें आंदोळिला कैलास पर्वत । त्या मज बळी फांसा मागत । अपूर्व येथ देखिलें ॥१६०॥ फांसा देईन ये काळीं । मग यातें मुष्टिघाततळीं । मारोनियां नेईन धुळी । ऐसा आवांका धरियेला ॥६१॥

कपटी रावणास फासा उचलेना. त्याची फजिती : ऐसें भाकोनि लंकानाथें । फांसा उचलितां दोहीं हातें । नुचलेचि तो मग विसां भुजातें । पसरिता झाला ते समयीं ॥६२॥ फांसा धरितां विसां हातीं । नुचले रावणा क्षीण शक्ती । प्रयासें उचलिता तंव प्रारब्धगती । भूमीं पडिला रावण ॥६३॥ फांसा लोटला कपाळावरी । पडोनि अशुद्ध[4] ते अवसरीं । वाहूं लागलें तंव राजनारी । न्या दूरी म्हणतसे ॥६४॥ दशमुख आणि विंशति[5] कर[5] । करंटें कोणें आणिलें समोर । याचे अशुद्ध देखों नये सत्वर । काढा काढा लवकरी ॥६५॥

रावणाला बाहेर घालवून देऊन त्याचे वस्त्रहरण : बहुतां मुखाचें अपवित्र । शृंगारिलें जैसें कां प्रेत । त्याचें देखों नये रक्त । म्हणोनि दूर घातला ॥६६॥ बाहेर येवोनि रावण । चिंतातुर परम दीन । म्हणे नगराप्रति करूं गमन । येथें धडगती पैं नाहीं ॥६७॥ तंव वेढिला दैत्यगणीं । मुकुट हिरोनि नग्न करोनि । करिते झाले वस्त्रहरणी । नागवोनि सोडिला ॥६८॥ रावण कुंथत अति बळेंसीं । आलों होतों युद्धासी । पुरुषार्थी निवडिला गति ऐसी । आतां विटंबनेसी अवधारा ॥६९॥ रावणा नग्नीकरण होत । ऐसा झाला पैं वृत्तांत । म्हणे आतां लंका प्राप्त । कोणे काळीं होईल ॥१७०॥ ऐसें विचारोनि रावण । नगरद्वारा आला जाण । तव पुढें देखिला वामन । देदीप्यमान तेजस्वी ॥७१॥

नगराबाहेर जाण्यास वामनाकडून प्रतिबंध : रावणासी म्हणे वामन । बाहेर नको करूं गमन । राजाज्ञा अति दारुण । मज असे रे राक्षसा ॥७२॥ मी रायाचा आज्ञाधारी । राजाज्ञेविण न सोडीं बाहेरी । रावणें ऐकोनि ते अवसरीं । चिंतातुर पैं झाला ॥७३॥ क्षुधेनें पीडिला लंकानाथ । घरोघरीं भीक मागत । वामनें जठराग्नी चेतविला तेथ । पोट न[6] धात[6] कवणेपरी ॥७४॥ मार्गेपुढें नाहीं सुटका । अवदशेनें वरिलें लंकानायका । दावी लिंग नगरींच्या लोकां । संपत्ति देखा दावित ॥७५॥

रावणाची दुर्दशा : मग काय करी लंकापती । जावोनि अश्वशाळे करी विनंती । मुष्टि मुष्टि चणे द्या मजप्रती । क्षुधानिवृत्ति करावया ॥७६॥ अश्ववाहक म्हणती लंकानाथा । लिदीच्या

---

शब्दार्थ – १. रात्रीला, २. मूळांनी जल पिणारा, वृक्ष, ३. उदक, ४. रक्त, ५. वीस हात, ६. भरेना.

पाट्या घेईं माथां । बाहेर सांडूं नये तत्वतां । मग चणे क्षुधार्थीं देऊं तुज ॥७७॥ दहा मुकुटीं जडित दहा माथे । लिदीच्या पांट्या ठेवोनि तेथें । पोट न भरे विसां हातें । चणे खातां रावणा ॥७८॥ ऐसा कोंडला रावण । कांही युक्ति न चले जाण । चित्तीं पाहे विचारोन । सुटिका पूर्ण नव्हेचि ॥७९॥ वामनें पुरविली पाठी । लंके जावयाची खुंटली गोष्टी । उबगोनि दशानन शेवटीं । राहतां तेथें पैं झाला ॥१८०॥ ठकवोनियां दाशरथी । हरून नेईल सीता सती । येणें क्रोधें कश्यपी[1] मूर्ती[1] । थोर विपत्ति भोगावी ॥८१॥

रावणाचा पाठलाग : वामनातें ठकवोन । अदृश्यगती करी गमन । पळोन जातां दशानन । पुढें वामन देखिला ॥८२॥ भेणें पळे लंकापती । सर्वेचि चाले पाताळगती । धराधारक खुजट मूर्ती । देखोनि परती करितसे ॥८३॥ रावण म्हणे जी वामना । मज सोडोनि द्यावें जीवदाना । येरू म्हणे राजाज्ञा- । वीण रावरंका निर्गम[2] नाहीं ॥८४॥ पळों जातां दशदिशीं । तेथेंही व्यापकत्व वामनासी । देखोनि रावण अति भयेंसीं । खेचरगतीसींही चालेना ॥८५॥ जैसा दरिद्रियाचा उदीम । फळ नेदी क्लेश परम । पापियामुखीं श्रीराम । न ये जैसा कल्पांतीं ॥८६॥ अशुचिया[3] जैसा जप । कुलहीना जैसें तप । निंदकासि जैसें पाप । फळ नेदी पुण्याचें ॥८७॥ तैसें झालें दशानना । सायास वृथा गेले जाणा । पुढें क्षुधेनें केला दीनवाणा । भीक रावणा लाविली ॥८८॥ नगर स्त्रियांसि करी विनंती । मी सूत कांतीन बहुतां हस्तीं । दहा रहाट दहा पंक्तीं । अन्ननिश्चिंती करावी ॥८९॥ कापूस वेढितां दशानन । तोंडघसीं पडला जाण । मुखीं सरक्या भरोन । अति लज्जा पावला ॥१९०॥ चुकोनियां मुळींचा तंतु । कांतूं बैसला लंकानाथु । निजधर्माचा मोडे चातु । स्त्रिया मारित टोले वरी ॥९१॥ पुढें खंडेरायाच्या होवोनि श्वान । भुंकों लागला मागे अन्न । परिवेष्टित लहान सहान । मुलीं वेढोन घेतला ॥९२॥ कोणी टाकिती खापरें । म्हणती कोणी मर मरें । एक म्हणती मागें सरें । आपदा[4] थोर पावला ॥९३॥ पोटालागीं नाचे दारोदारीं । वीस हात नाचवी नानापरी । जंबुकगर्दभस्वरेंकरीं । तुकडे घरोघरीं मागत ॥९४॥

रावणाचा पिता बळीकडे येतो : ऐसी दशा रावणासी । हाक गेली पौलस्तीपासीं । तेणें येऊनि वेगेंसीं । पुत्रशुद्धी[5] केली ॥९५॥ सोडवावया निजपुत्रासी । सुतळीं प्रवेशे पौलस्ति ऋषी । येवोनि बळीच्या नगरासी । पुत्रशुद्धीसी करितसे ॥९६॥ तंव देखिला दुरोनि दशानन । खंडेरायाचा होवोनि श्वान । भिक्षा मागे पोटांलागून । ऋषि लज्जा पावला ॥९७॥ ऋषि जात बळीपांसीं । अति सन्मानें पूजोनि त्यासी । पुसता झाला कोणीकडे ऋषी । आगमन झालें तुमचें ॥९८॥ सांभाळावया चकोरासी । निजमंडळ सांडी शशी । तैसें तुमचें आगमन ऋषी । दीनजनांसी उद्धरावया ॥९९॥ आळसियावरी अनुग्रहार्थ[6] । उद्धरावया शिवजटेचें तीर्थ । तैसें तुमचें आगमन येथ । कृपायुक्त आलेती ॥२००॥ कोणे कार्यालागीं ऋषी । तुम्ही आलेति या ठायासी । येरु म्हणे त्वां रावणासी । कोंडोनि कां राखिलें ॥१॥ सुतळादिपतीनें वाहिली आण । म्हणे माझ्या नगरीं बंदिवान । नाहीं रोग उपद्रव जाण । दरिद्रपण असेना ॥२॥ कोणे ठायीं कोणें नगरीं । कोणें राखिला दशशिरी । शोधोनि आणा ये अवसरीं । सन्मानेंकरीं सोडीन ॥३॥ पाहूं जातां पौलस्तिमुनी । लिदीच्या पांट्या माथां घेवोनी । तुकडे खात चाले मेदिनीं । येतां दुरोनी देखिला ॥४॥ पौलस्ति देखतां पौलस्ति- नंदन । भुकिन्नला होवोनि श्वान । पुढें चाले तंव दर्शन । पितया देखोन लाजला ॥५॥ ब्रह्मसुत म्हणे निजतनया । एवढ्या आपदा भोगावया । राखिलें असे काय राया । जावों नेदी बळिराज

---

शब्दार्थ - १. वामन, २. सुटका, ३. अपवित्राला, ४. दुःख, ५. मुलाचा शोध, ६. कल्याणार्थ.

॥६॥ कोंडोनि राखिलें वामनें । ऐसें बोलतां दशाननें । मग काय केलें पौलस्तीनें । सावधान मनें अवधारा ॥७॥ करीं धरोनि दशशिर । पौलस्ति येवोनि वामनासमोर । आज्ञा द्यावी हा लंकेश्वर । निजराज्यास जाईल ॥८॥ पौलस्ति देखोनि वामन । घातलें साष्टांग लोटांगण । मस्तकीं वंदोनियां चरण । धर्मवचन अनुवादे ॥९॥ बळिरायाचा मी सेवक । द्वारपाळ द्वाररक्षक । आज्ञेवेगळे राव रंक । एकाएक जाऊं नेदीं ॥२१०॥ राजाज्ञा घेतल्यावरी । अवश्य न्यावा जी बाहेरी । रोकडे सुटकेची ऐका परी । निर्गमन व्हावया ॥११॥

रावणाचे वपन व मुंडण करण्याची वामनाची आज्ञा : मुनि म्हणे कैसे चिन्हा । आनंदें सांगावें वामना । पंचकद्वयशिरां वपना । आणि मुंडणा खांडमिशा ॥१२॥ श्याम करोनियां वदन । दशनासिकीं कवड्या बांधून । मुखीं श्वेत पीत लेपन । ये चिन्हें निर्गमन मुनिराजा ॥१३॥ स्वयंभूतनय[1] म्हणे निजपुत्रासी । तुज नेईन रायापासीं । सन्मान देईल मुद्रिकेसीं । जावयासी रावणा ॥१४॥ येरु म्हणे अहो जी ताता । मुख न दाखवीं बळीस आतां । रायासि फांसा आणून देतां । दांतघसीं पडलों मी ॥१५॥ युद्धा आलों अति सत्राणें । मज झालें लाजिरवाणें । येथेंचि आतां प्राण देणें । परी नाहीं येणें बळीपासीं ॥१६॥ ऋषि म्हणे निषिद्ध राजवपन । येरु म्हणे कैंचें राजलक्षण । सुडका लागला अति दीन । मुंडन केलिया भय काय ॥१७॥ जे जे होती बंदिनिर्मुक्त । त्यांसी पाहिजे प्रायश्चित । मज आजीच आला सिंहस्थ[2] । निषेधार्थ न वदावा ॥१८॥ वामनापासीं निर्मुक्ती । कदा नव्हे कल्पांतीं । माझेनि भाग्यें वपनाकृती[3] । बोलिला निर्मुक्ती वामन ॥१९॥

मुंडण केल्यावर रावणाची सुटका : ऐसें बोलोनि दशवदन । खांडमिशा मस्तकवपन । काळें करोनियां वदन । आला आपण अति शीघ्र ॥२२०॥ देखोनि रावणाचें चिन्ह । लाजवित सकळ जन । गोमयपिंडीं[4] अभिषेकून । दिधला सोडून वामनें ॥२१॥ याउपरी पौलस्तिनंदन । पुष्पकविमानीं आरूढोन । आक्रमिता झाला गगन । लंके उजू[5] चालिला ॥२२॥ एक जनार्दना शरण । अगस्ति सांगे बळीचें कथन । आतां पुढिले प्रसंगीं जाण । सांगेल आपण घटोद्भव ॥२३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां प्रेतराजदशाननयुद्धबळिराजनगरे रावणवपनविटंबनं नाम सप्तविंशतितमोऽध्याय: ॥२७॥ ओंव्या ॥२२३॥

## अध्याय अठ्ठाविसावा

॥ श्रीदाशरथये नम: ॥

### शूर्पणखेचे दंडकारण्यात गमन

दाशरथि वीरचूडामणी । कथा पुसे कुंभोद्भवालागूनी । म्हणे वरुणपुत्रांतें जिंतोनी । रावणें पुढें काय केलें ॥१॥ अगस्ति म्हणे वीरशार्दूळा । जनकजामाता अयोध्याभूपाळा । पूर्णब्रह्म अवतारखेळा । खेळतोसी नटनाट्यें ॥२॥ निर्विकल्प ब्रह्म तूं सनातन । विरिंचि हा तुझा नंदन । जयानें सृष्टि केली निर्माण । ब्रह्मसृष्टि जाण म्हणिजे ते ॥३॥ तुझी आज्ञा वंदी कळिकाळ । तुझी माया हे लोकां सबळ । तो तूं आम्हाप्रति कुशळ । कथा ऐकों इच्छिसी ॥४॥ तरी ऐकें गा श्रीरामचंद्रा । निर्गुणा जी गुणसमुद्रा । तुझिये आज्ञेनें नरेंद्रा । वाचा चारी वदती शब्द ॥५॥

---

शब्दार्थ - १. पौलस्तिमुनी, २. वाईट वेळ, ३. मुंडण, ४. शेणाच्या गोळ्यांनी, ५. सरळ.

**रावणाकडून वरुणस्त्रियांचें अपहरण :** पुढें त्या पौलस्तिनंदनें । वरुणलोक जिंतोनि तेणें । महावीर मारोनि सेने । त्यांच्या स्त्रिया देखिल्या ॥६॥ सुंदरा आणि अति सुकुमारा । राजकन्या गंधर्वकन्या अपारा । आणि ऋषिकन्या थोरथोरा । हरिता झाला लंकेश ॥६॥ पन्नग यक्ष सुरगण । दैत्य आणि सिद्ध चारण । त्या समस्तांतें मारून । स्त्रिया जाण हरिता झाला ॥८॥ स्त्रिया वाहोनि विमानीं । रावण परतला घेवोनी । मार्ग क्रमितां योषिता जनीं । खेद करिती आक्रंदें ॥९॥

**त्या स्त्रियांचा विलाप :** म्हणती पूर्वी काय पाप केलें । राक्षसें आमुच्या भ्रतारां मारिलें । गणगोता निःसंतान केलें । पुढें आमुतें भक्षील हा ॥१०॥ अदृष्ट आमुचें बळवंत । म्हणोनि रावणा झालों प्राप्त । विमानीं भरोनि स्त्रिया समस्त । असे नेत लंकेसीं ॥११॥ नदिया समुद्रीं जेंवी भरती । तेणें पूर्ण अपांपती । तैशा विमानीं स्त्रिया नेणों किती । लंकेप्रती चालविल्या ॥१२॥ मार्गीं स्त्रिया शोक करिती । एक रडती आक्रंदती । एक कानकेश तोडिती । एक चरफडती अति दुःखें ॥१३॥ अधोमुखें एकी करिती । एकी भूमीवरी उदकें लिहिती । जे रावणकुळा हो समाप्ती । ऐसें म्हणती पैं एकी ॥१४॥ या स्त्रियांचें वर्णितां रूप । देखोनि लाजे कंदर्प[1] । अष्टनायिकाही त्यांपुढें अल्प । लाजें समीप येवों न शकती ॥१५॥ एकीचे केश लंबायमान । एकी चंद्रवदना संपूर्ण । एकींचे मृगांसारिखे नयन । एकी तरुण षोडशवर्षा ॥१६॥ बाला प्रौढा मुग्धा[2] नारी । शोक करिती नानापरी । म्हणती अगा ये त्रिपुरारी । कोण कर्म आमुचें ॥१७॥ तया शोकेंकरोनि जाण । काळवंडलें ते विमान । जेंवी अग्निहोत्राच्या धुरें जाण । गृह काळिमा पावत ॥१८॥ श्वासोच्छ्वास टाकिती । एकी पूर्वस्थिती आठविती । आम्हांवीण आमुचे पती । कोण गती पावतील ॥१९॥ आमुचे पुत्र आम्हांवीण । सांडितील आपुला प्राण । सासू सासरे दीर भावे जाण । कोण गती करितील ॥२०॥ आम्ही पतिव्रता पतीवीण । येथें सांडूं पाहों प्राण । परी हा राक्षस दुर्जन । न लागतां क्षण मारील ॥२१॥ रावणहातें मृत्यु होतां । आम्हीं जावें अधःपाता । अथवा स्वबुद्धी प्राण त्यागितां । नरकपाता पाविजे ॥२२॥ पूर्वजन्मीं कोण आचरण । केलें असेल दारुण । तेणें पापें रावणें धरून । लंकाभिगमन करवितो ॥२३॥ पारब्ध बळवंत सृष्टीं । तें भोगवितें दुःखकोटीं । विधात्या दुष्टें लिहिलें ललाटीं । कर्म आपुलें देखोनी ॥२४॥ अदृष्ट आमुचें बळवंत । तेणें बंधन झालें प्राप्त । आम्हां सोडविता नाहीं येथ । एका अच्युतावांचोनी ॥२५॥

**रावणाला शाप :** आमचें रावणें केलें ग्रहण । दुष्ट दुरात्मा निंद्य जाण । पुढें स्त्रियांचें करितां ग्रहण । अवश्य मरण पावेल ॥२६॥ ऐसा शाप वदती कन्यका । पुढें परदार[3] धरितां दशमुखा । मरण पावेल सकुळी देखा । आमचेनि दुःखेंकरोनी ॥२७॥ तदनंतर लंकापती । प्रवेशला लंकेप्रती । समस्त राक्षस पूजिती । राजा म्हणोनि लंकेचा ॥२८॥

**रावणासमोर शूर्पणखेने पतिनिधनाचा विलाप केला :** इतुकियावरी काय वर्तलें । शूर्पणखेनें काय केलें । येवोनि रायापुढें घडविलें । दुःखार्णवाचें भांडार ॥२९॥ रावणाच्या पायांवरी पडे । अति आक्रंदोनि दीर्घ रडे । अंग टाकी चहूंकडे । ललाट करें पीटित ॥३०॥ मग रावण म्हणे तियेसी । काय झालें सांग आम्हांसी । कवणें तूं गांजिलीसी । शोक करिसी कासया ॥३१॥ वक्रदृष्टीनें तूतें । कोणीं पाहिलें सांग मातें । कीं कोणें दाविलें हातातें । त्याच्या प्राणातें घेईन ॥३२॥ बंधूचें ऐकोनि वचन । शूर्पणखा बोले आपण । म्हणे राया माझ्या

---

शब्दार्थ - १. मदन, २. नुकत्याच वयात आलेल्या, ३. परस्त्री.

प्राणपतीचें हनन[१] । तुवां संग्रामीं केलें पैं ॥३३॥ अगा ये बंधो अवधारीं । तुझेनि वैधव्य माझे शिरीं । ऐसी तुझ्या बळाची थोरी । सचराचरीं वानिजे ॥३४॥ शालक[२]रणीं मारून । भगिनीस वैधव्य भूषण । तुझी कीर्ति जगीं पावन । बंदिजन वाखाणिती ॥३५॥ तूं निलाजिरा लंकनाथा । शालकवधाची तुज हत्या। येरु म्हणे तुझा भर्ता । कोणे काळीं वधिला म्यां ॥३६॥ येरी म्हणे काळिकेय दैत्य। मारिला तैंच माझा कांत। तूंचि वैरी तयासि अन्यत्र । नाहीं वधाकारणें ॥३७॥ तुवां वैर करून । काळिकेय मारिले दैत्यगण । तयांत माझें पतिनिधान। तुवां तस्करें हरिलें रे ॥३८॥ रावण म्हणे भगिनीप्रती । म्यां युद्ध केलें अगाधख्याती । रणमद चढला तेणें भ्रांतीं । आपपर नेणेंच ॥३९॥ भद्रे मजकारितां रण। नाठवेचि मीतूंपण । यालागीं तूं आपण । दुःख दारुण न करावें ॥४०॥

शूर्पणखेला खर-दूषणांसह दंडकारण्य दिले : अवो वत्से भय सांडीं । दुःखा करीं देशोधडीं[३]। भोगीं निजसुख आवडीं । बंधूचेनि प्रसादें ॥४१॥ मी तुज देतों मान दान । आणिक करावया संरक्षण । तुझे पाठीसी ठेवितों खरदूषण । बंधूचेनि प्रसादें ॥४२॥ दंडकारण्य जनस्थानीं । ब्रह्मगिरी समीप तेथोनी । गोदा अरुणा वरुणा त्रिवेणी । ओघ पूर्ण ते ठायीं ॥४३॥ पद्मपुरनाम नगर । दूषणेंसीं[४] तुम्हीं वसावें सत्वर । शाप वदला भृगुमुनिवर । जे दंडकीं राक्षस असतील ॥४४॥ मान देवोनि मुनीच्या वचना । तुम्हीं तेथें करावें गमना । चवदा सहस्त्र राक्षससैन्या । घेवोनि तुम्हीं पैं जावें ॥४५॥ तेथें होईल तुमची कीर्ती । खरदूषणांही शीघ्रगतीं । जावें वेगीं पद्मपुराप्रती । ऐसे नृपती बोलिला ॥४६॥ ऐकोनि रावणाचें वचन । शूर्पणखा बंधुसहित ससैन्य । वेगीं विमानीं आरूढोन । दंडकारण्य पावली ॥४७॥ खरदूषणां पद्मपुरीचें । राज्य दिधलें रावणें साचें । शूर्पणखेसी प्रधानत्व तेथींचें । लंकानायके पैं केलें । ॥४८॥ शूर्पणखेचे प्रीतीकरून । रावण वसवी दंडकारण्य । एका जनार्दना शरण । रामायण अति रम्य ॥४९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां शूर्पणखा-खरदूषणदंडकारण्यप्रवेशो नाम अष्टाविंशतितमोऽध्यायः ॥२८॥ ओंव्या ॥४९॥

## अध्याय एकूणतिसावा

॥ श्रीरामचंद्र नमः ॥

### मधुदैत्य व रावणाची भेट

राक्षसाधीश रावण । खरदूषणांसह जनस्थान । जें घोर अति दारुण । शूर्पणखेलागून दिधलें ॥१॥ मग पाहतांचि निजमंदिर । प्रवेशला दशशिर । कनकप्रभा तेज अपार । रत्नवैदूर्य खांबोखांबीं ॥२॥ सुवर्णभित्ती अति कुसरी[५]। चित्रें लिहिलीं नानापरी । माजि देवांगने सारिखी मंदोदरी । देखोन सुख पावला ॥३॥ देवकन्या गंधर्वकन्या जिच्या दासी । अष्टनायिका लाजती देखोनि रूपासी । ऐसी मंदोदरी देखोनि मानसीं । रावण सुखासी पावला ॥४॥ कनकाचिया मंचकावरी । शेज रचली सुमनेंकरीं । विंजणा[६] वीजती[६] एकी नारी । एकी विडिया पैं देती ॥५॥ एकी चरण प्रक्षाळिती । एकी संवाहन करिती । एकी अंगी चंदन चर्चिती । एकी दाविती दर्पण ॥६॥ ऐसें मयासुराचें दुहितारत्न । रावणाचें गृहमंडन । देखोनि सुखावला दशानन । नावेक तेथें क्रमियेलें ॥७॥

---

शब्दार्थ - १. वध, २. मेहुणा, ३. देशपार, ४. दूषणदैत्यासह, ५. अति कुशलतेने, ६. वारा घालतात.

**निकुंभिळेत इंद्रजित यज्ञ करीत होता तेथे रावण आला :** तदनंतर राक्षसराजू । निघाला निकुंभिळें उजू । पहावया ज्येष्ठ आत्मजू । मेघनाद नाम ज्याचें ॥८॥ तंव येरीकडे इंद्रजितें । मांडिलें अभिचारहोमातें । शुक्राचार्य गुरु तेथें । यज्ञक्रियेतें संपादीं ॥९॥ समस्त यज्ञ संपूर्ण झाला । पूर्णाहुतीचा समय आला । तंव अकस्मात रावण प्रवेशला । तया भवनामाझारीं ॥१०॥ पाहत पाहत दशानन । पुढें देखिला महायज्ञ । तेथें बैसला इंद्रजित आपण । देदीप्यमान तेजस्वी ॥११॥ चीरकृष्णाजिनांबर । कमंडलु माथां जटाभार । भस्मचर्चित सर्व शरीर । नेत्र आरक्त जाज्वल्य ॥१२॥

**यज्ञ करण्याचे निमित्त रावण विचारतो :** ऐसें देखोनि स्वसुतातें । रावण बोलता झाला त्यातें । अगा ये वत्सा कोणे कर्मातें । काय कारणें आरंभिलें ॥१३॥ कवण उत्कंठा मनीं । वर्ततसे तुजलागोनी । सांगावी गा येच क्षणीं । कायावाचामानसें ॥१४॥ ऐसें वचन लंकेश वदला । मग शुक्राचार्य सांगता झाला । ऐकें राया यज्ञ आरंभिला । महत्कार्य साधावया ॥१५॥

**शुक्राचार्यांनी सात यज्ञ व त्यांची फलश्रुती रावणाला सांगितली :** सहा यज्ञ पूर्ण झाले । सातव्या माहेश्वर यज्ञातें सिद्धी पावविलें । संपतेसमयीं आगमन केलें । तुवां राक्षसचूडामणे ॥१६॥ सात यज्ञ कोणते म्हणसी । तुझे पुत्रें केलें त्यांसी । मी सांगतसें जी परियेसीं । अनुक्रमें नामें त्याचीं ॥१७॥

**अग्निष्टोश्च मेधश्च यज्ञो बहुसुवर्णकः । राजसूयस्तथा यज्ञो गोमेधो वैष्णवस्तथा ॥१॥**
**माहेश्वरे प्रवृत्ते तु यज्ञे पुंभिः सुदुर्लभे ॥२॥**

अग्निष्टोम अश्वमेध । बहुसुवर्णयज्ञ प्रसिद्ध । याचकांसी नाहीं अवरोध । भूरिदक्षिणा ते समयीं ॥१८॥ राजसूय चवथा जाण । पांचवा गोमेध यज्ञ । सहावा वैष्णव यज्ञ । माहेश्वर । ॥१९॥ माहेश्वराची समाप्ती । प्राकृत नव्हे गा नृपती । तुझी वाट पाहतां भूपती । तंव तूं आलासि ये समयीं ॥२०॥

**इंद्रजिताला वरप्राप्ती :** वरद पावला तुझा पुत्र । यासि प्रसन्न उमाकांत । दिधला महा दिव्य रथ । अंतरिक्षीं विचरेसा ॥२१॥ माया लाधला तामसी । जिचेनि अंधार अरिदृष्टीसीं । राया बळिया याचे समतेसीं । नाहीं ब्रह्मांडगोलकांत ॥२२॥ याचें विंदान सुरांसुरां । न कळे गा राक्षसेश्वरा । अक्षयी भाता बाण दुर्धरा । क्षय नाहीं रणांगणीं ॥२३॥ अरिमर्दनीं वज्रचाप । शस्त्रें वज्रप्राय अमूप[1] । अरि विध्वंसोनी महाप्रताप । तुझा पुत्र लाधला ॥२४॥ इतुकिया समस्त वरांतें । यज्ञीं साधिलें इंद्रजितें । तुझी वाट पहात होते । तेथें यज्ञमंडपामाझारीं ॥२५॥ ऐकोनि उशनाचें[2] वचन । कोय बोलिला दशानन । म्हणे पुत्रें केलें प्रमाण । परि अनुचित घडलें तुज ॥२६॥ यज्ञीं वैरी तृप्त केले । इंद्रदिकां तुवां पूजिलें । हेंचि एक अनुचित घडलें । आतां चाल उठीं मंदिरा ॥२७॥ तदनंतर तो पौलस्तिसुत । पुत्रबंधूंसहित मंदिराप्रत । प्रवेशला सुखानंदस्थित । यावरी काय वर्तलें ॥२८॥ देवगंधर्वसुरकन्यका । विमानीं घातल्या होत्या देखा । त्या उतरोनि महादुःखा । करिता झाल्या ते समयीं ॥२९॥

**गंधर्वकन्यांना पळवून आणल्याबद्दल बिभीषणाकडून रावणाला दोष, बहीण कुंभीनसी राक्षसांनी पळवल्याचे वृत्तनिवेदन :** तयांचें देखोनि आक्रंदन । धर्मात्मा तो बिभीषण । रावणाप्रती काय वचन । बोलता झाला ते काळीं ॥३०॥ अग्रजा[1] हें कर्माचरण । येणें कुळासी निःसंतान ।

---

शब्दार्थ - १. कुशलत्व, २. शुक्राचार्यांचे.

येणें पूर्वजा होय पतन । वंशा दूषण हेंचि पैं ॥३१॥ तूं वरदबळें झालासी उन्मत्त । शुभाशुभ नेणसी कृत्य । योषिता धरोनि आणिल्या येथ । अधर्म राज्यांत प्रवेशला ॥३२॥ तूं नसतां लंकाभवनीं । कुंभीनसी आमुची बहिणी । ते नेली राक्षसें हिरोनी । अपकीर्ति जनीं पैं झाली ॥३॥ बिभीषणासी बोले रावण । कोणी नेली ते मज नाहीं ज्ञान । तूं सांग गा विस्तारून । समूळ विवंचन मजप्रती ॥३४॥ बिभीषण होवोनि कोपायमान । रावणाप्रती बोले वचन । म्हणे राया पापाचें फळ ठाकून । आम्हांप्रति पैं आलें ॥३५॥ आमचा मातामह[२] माल्यवंत । त्याचा ज्येष्ठ बंधु सुमाळी विख्यात । ऋषींमध्यें बुद्धिवंत । तपोधन ज्ञानराशि ॥३६॥ त्याची कुंभनसी नाती । मावसबहीण आम्हांप्रती । तिची अग्नीपासून संभूती[३] । सत्य नृपती पैं झाली ॥३७॥

मधुदैत्यानें बहिणीला पळविले : ऐकें अग्रजा मावसभगिनीतें । हिरोनि नेलें मधूनें आपुले नगरातें । मारोनि आमच्या सैन्यातें । बळवंतें पैं नेली ॥३८॥ यज्ञ करित होता इंद्रजित । कुंभकर्ण निद्राभिभूत । मी उदकीं होतो ध्यानस्थ । मजही श्रुत नाहीं झालें ॥३९॥ कुंभीनसी होती अंत:पुरीं । तेथें प्रवेशला तो दुराचारी । धरोनि नेली करोनि मारी । प्रळय नगरीं पैं झाला ॥४०॥ राया लौकिकीं ऐसें झालें । अपकार्तीचें भरतें आलें । ऐकोनि क्रोधें उचंबळलें । दशग्रीवाचें मानस ॥४१॥

मधुदैत्यावर रावणाची ससैन्य स्वारी : क्रोधें आरक्त झाले नयन । आतां सिद्ध करा सैन्य । रथ आणा शीघ्र गमन । करावया अरिवध ॥४२॥ वेगीं सैन्या हाकार[४] केला । कुंभकर्ण इंद्रजित सर्वे घेतला । नाना शस्त्रांचा समूह एकवटला । युद्धा निघाला रावण ॥४३॥ मंदोदरीकांत मनीं विचारी । आधीं मधूची करीन बोहरी । मग सुरलोका जाईन निर्धारीं । त्रैलोक्यींचे भोग भोगिती जेथें ॥४४॥ सर्वे सैन्य चारी सहस्र । आणिक चार अधिक वीर । जे पालथें करिती ब्रह्मांडोदर । सप्त सागर शोषिते जे ॥४५॥ अष्टलोकांची बांधिती मोळी[५] । स्वर्गाच्या उलथिती डिखळी । सुरासुर देखोनि कांपती चळीं । ऐसें आतुर्बळी राक्षस ॥४६॥ जयांचे शस्त्रांचें सामर्थ्य । रणीं देवदानव चळचळां कांपत । पाताळादिलोक भयभीत । रणरंगी भिडतां हो ॥४७॥ ऐसे राक्षस निघाले भारी । त्यांपुढें शक्रजित रणकेसरी । पृष्ठभागीं कुंभकर्ण दीर्घशरीरी । मध्ये रावण शोभत ॥४८॥ लंके ठेविला बिभीषण । जो कां धर्मपरायण । करावया त्रिकूटाचें रक्षण । प्रजापाळणनिमित्तें हो ॥४९॥ उरले सैन्येसीं दशानन । मधुपुराप्रति करी गमन । एक महाखरीं वळंघोन । एक चढला उंटावरी ॥५०॥ एकीं अश्व पालाणिले । एक कुंजरी आरूढले । एक तुरगीं[६] चढिन्नले । एकांचें वहन शिशुमार ॥५१॥ ऐसा दशानन सहपरिवारीं । चालिलासे राक्षसभारीं । वीर दाटले अंबरीं । दिशा चारी कोंदल्या ॥५२॥ जळीं स्थळीं रजनीचर । कोंदले राक्षसांचे भार । मनोवेगाहूनि सत्वर । मधुपुरातें पावले ॥५३॥

मधुपुरास आल्यावर वैधव्य आणू नये म्हणून बहिणीची रावणाला प्रार्थना : नगरीं पाहतां वैरियातें । परी तो न दिसेचि तेथें । तंव देखिलें भगिनीतें । राक्षसराजें ते काळीं ॥५४॥ मग ते कुंभीनसी हात जोडून । दोनी चरणां लोटांगण । रावणासी विज्ञापन । दीनवाणी करोनि करी ॥५५॥ राक्षसराज चूडामणी । तुमच्या भुजा यशस्वी रणीं । मी अनाथ तुमची भगिनी । आणिलें धरोनी मधूनें ॥५६॥ कुंभकर्ण तिजसीं बोलत । अवो भगिनी तुज भय नाहीं

---

शब्दार्थ - १. हे श्रेष्ठ बंधो, २. आजा (आईकडून), ३. जन्म, ४. बोलावणें, ५. गठडी, ६. घोड्यांवर.

निश्चित । आमचा वैरी त्याचे यथार्थ । आम्ही येथें आलों असों ॥५७॥ म्हणे राया अभय दिधलें । तें वचन पाहिजे सांभाळिलें । प्रसन्न झालासि तरी भ्रतारा राखिलें । पाहिजें माझ्या ये काळीं ॥५८॥ वाचा सत्य आपुली कीजे । माझें वैधव्य चुकविजे । वैधव्यापरीस भय दुजें । मज नाहीं राक्षसेंद्रा ॥५९॥ माझा प्राणपति राखोन । आपुलें सत्य करा वचन । ऐसें ऐकोनि रावण । बोलता झाला तियेसी ॥६०॥

**मधूला न मारण्याचे रावणाचे आश्वासन :** अवो वत्से ऐक वचन । तुझा भ्रतार आहे कोण । तो मज सांगें न लागतां क्षण । नामाभिमान तयाचें ॥६१॥ सांगातें मी घेवोनि त्यासी । जाईन सुरलोक जिंकावयासी । तुझी करुणा देखोनि मानसीं । मी त्यासी न वधीं हो ॥६२॥ इतुकें ऐकोनि रावणवचन । कुंभीनसी तत्काळ उठोन । भय सांडोनि निर्भयमन । भ्रतार निजला तेथें आली ॥६३॥

**कुंभीनसी मधू व रावणाची भेट घडविते :** मग म्हणे भ्रतारासी । निद्रा सांडूनि उठा वेगेंसीं । ऐका माझिया वचनासी । सावधतेसीं होऊनी ॥६४॥ माझा बंधु दशानन । आलासे तुमच्या भेटीलागून । समागमें कुंभकर्ण इंद्रजित जाण । आणि प्रधानसैन्येंसीं ॥६५॥ सुरलोकांच्या जयार्थ । आलासे तुमच्या भेटीची धरूनि आर्त । भेटी घेवोनि तुम्ही त्वरित । युद्धा साह्य त्यासी व्हावें ॥६६॥ पृथ्वीजयो तेणें केला । आपुला पुरुषार्थ मिरविला । अरिवीरां धाक सुटला । नाम त्याचें ऐकोनी ॥६७॥ ऐसा बळी राक्षसराज । तयासि तुमचे भेटीचें काज । तो येथें आला असे सहज । तुम्हीं त्यासी भेटावें ॥६८॥ ऐकोनि प्रियेचें वचन । मधु उठिला तत्काळ जाण । रायासि भेटोनि आलिंगन । अर्घ्यपूजन पैं केलें ॥६९॥

**रावणाचा मधूकडून सत्कार :** पूजा करोनि राजोपचार । देखोनि संतोषला दशशिर । तदनंतर अस्ता भास्कर । गेला निशा प्रवर्तली ॥७०॥ सैन्यासहित दशानन । पुत्रबंधूंसहवर्तमान । संतोषें निशा तेथें क्रमोन । पूर्वे भान उगवला ॥७१॥ उदय होतांचि सहस्रकिरण । स्नानसंध्या तेथें सारून । सर्वेचि निघाला मधूसहवर्तमान । कैलासासी लक्षून चालिला ॥७२॥ एका जनार्दना शरण । रम्य रामें रामायण । श्रवणें भवदोषां खंडण । करी निर्दळण कामक्रोधां ॥७३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां मधुरावणदर्शनं नाम एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ॥२९॥ ओंव्या ॥७३॥ श्लोक ॥२॥ एवं ॥७५॥

## अध्याय तिसावा

॥ श्रीरमाकांताय नमः ॥

### रावणाला नलकुबेराचा शाप

**रावणाचे कैलासावरील उपवनांत आगमन :** पौलस्तितनयचूडामणी । निशी मधुपुरीस क्रमोनी । तदनंतरें कैलासाचे उपवनीं । अलकावतीसमीप आला ॥१॥ देखोनि अग्रजाचें नगर । तेथें राहिला सहित निशाचर । तंव अस्तमाना गेला भास्कर । प्रकट झाली शर्वरी[1] ॥२॥ क्षीराब्धिसुतें[2] उदय केलियावरी । चांदणें प्रकटलें अंबरीं । दिशा धवळिल्या तेजेंकरीं । कैलासगिरी शोभला ॥३॥ राक्षसवीर आतुर्बळी । शस्त्रें उसां घालोनि निद्रासमेळीं । तंववरी सुरारि इकडे ते काळीं । वन न्याहाळीत पैं होता ॥४॥

---

शब्दार्थ – १. रात्र, २. चंद्राने.

**चांदण्यात दिसणारे वनसौंदर्य :** शैलपाठारींचे उपवन । आनंदवनाहूनि गहन । चैत्रगहन अशोकवन । त्या समान पैं नव्हती ॥५॥ नाना तरूंच्या याती । कण्हेर नाना वर्णांचे शोभती । कदंब कुसुमें लागले असती । नानापरींच्या कमळिणी ॥६॥ रम्य मंदाकिनीचें[1] तीर । चंपकवृक्ष मनोहर । अशोक पुन्नाग मांदार । गगनचुंबित वाढले ॥७॥ आंबे पाटली लोध्राचें वृक्ष । केतकी अर्जुनवृक्ष असंख्य । केळी नारळी पळस अनेक । जांबळी रायआंवळी ॥८॥ हरीतकी आणि चंदन । खैर धामोडे बिल्ववृक्ष गहन । ताड माड सिंदी गगन । स्पर्धा करिती उंचपणें ॥९॥ आणिक वृक्षांसी नाहीं मिती । सांगितले आहेत अनेकीं ग्रंथीं । तितुके सांगतां विस्ताराप्रती । कथा जाईल ज्ञाते हो ॥१०॥ ऐसें सुशोभित वन । तेथें किन्नर करिती गायन । मधुर नाना मूर्च्छन । सारी गमादि पैं गाती ॥११॥ जयांचें ऐकतां गायन । मनासि सुख वाटे गहन । तेथें विद्याधर मद्य सेवोन । आरक्तलोचन करोन डुल्लत ॥१२॥ योषिता तेथें नेणों किती । नाना परींचें शिंपणें शिंपिती । हर्षे उल्लासें क्रीडती । चांदणे रातीं वसती सदा ॥१३॥ एकी वीणा वाजविती । एकी मोहरींत आलाप करिती । एकी नाना वाद्यीं व्युत्पत्ती । दाविती त्या धनदालयीं ॥१४॥ मंद सुशीतळ पवन । मधुमाधव ऋतु जाण । वसंत शरद आदिकरून । तये पर्वतीं वसती सदा ॥१५॥ नानापरींच्या पुष्पयाती । तयांचे सुगंध वायु येती । तेणें लंकेश सुखावोनि चित्तीं । मदनाकार वृत्ती पैं झाली ॥१६॥ गायन अत्यंत सुस्वर । आणि पुष्पांचा सुवास मधुर । मंद करुन आकाशसंचार । स्पर्श करीत प्राणियां ॥१७॥ तेचि समयीं अब्धिनंदनें[2]। गगनीं पसरिलीं किरणें । दिशा धवळिल्या निर्मळ चांदणें । कामिकांचीं मनें मोहती ॥१८॥

**कामपीडित रावणाला रंभा दिसली :** ऐसियापरी तो पौलस्ति । कामासि झाला वशवर्ती । भ्रांत होवोनि दिशांगनांप्रती । पुनः पुनः अवलोकी ॥१९॥ इतुकें वर्तलेंसे तेथ । तंव दिव्याभरणभूषित । कटिमेखळा विद्युत्प्राय झळकत । स्तन शोभत पैं दोन्ही ॥२०॥ सर्व अप्सरांमाजि जाण । श्रेष्ठ रंभा चंद्रवदन । अंगीं उटी दिव्यचंदन । कुसुमें शोभती वेणीसीं ॥२१॥ अत्यंत शोभती दोनी जघन । पोरटिया जैसे मीन । कटिभाग सिंहीं देखोन । लाजोनि वन सेविलें ॥२२॥ नीळवस्त्रपरिधान । करीं शोभती जडित कंकण । मस्तकीं मुक्ताफळांची[3] जाळी तेण । तारांगण लोपले ॥२३॥ चरण अत्यंत सुकुमार । हंसती चाले सुंदर । सैन्य डावलोनि ते मनोहर । स्वधामाप्रति जातसे ॥२४॥

**रावणाने तिला पकडले, तिच्याजवळ आत्मप्रौढी व भोगयाचना :** रावणें देखिलें तियेसी । धांवोनि धरिली करें त्वरेंसीं । म्हणे तूं कोण कोठें जासी । झाली निशी यामांत[4] ॥२५॥ तुझें रूप अति सुंदर । कोठें जातेसि वो सत्वर । कोण तुझा भ्रतार । मूर्ख तुज विसंबला ॥२६॥ आतां तू मजसीं अनुसर । भोग भोगीं नाना उपचार । मी जाण वो लंकेश्वर । देवां दुर्धर धाक माझा ॥२७॥ तुझी सुंदर अत्यंत तन । कोण भोगिता भाग्यगहन । तूं मज अनुसरतां मी त्याहून । सुख देईन तुज प्रिये ॥२८॥ स्वर्गीचें करीं अमृतपान । लेई वो उत्तम आभरण । मज अनुसरतां कीर्ति गहन । लोकीं पावन होसील ॥२९॥ मी बळियाढा लंकानाथ । सुरासुर माझे आज्ञांकित । तो मी तुजपुढें याचक म्हणवित । वचन त्वरित मानीं माझें ॥३०॥ पुरुषांमाजि पंचानन । सृष्टीचा विधाता मी जाण । मी ब्रह्मकुळींचा ब्राह्मण । रावण अभिधान जाण माझें ॥३१॥

शब्दार्थ - १. गंगेचे, २. चंद्राने, ३. मोत्यांची, ४. एक प्रहर.

रंभेची रावणाला नकाराची प्रांजळ विनंती, रावणाकडून तिच्यावर बलात्कार : ऐकोनि दशाननाची मात । रंभा बोले लज्जान्वित । म्हणे तूं आम्हां पूर्वज गुरु येथ । निंद्य वचन बोलूं नये ॥३२॥ अन्यत्र करितां मज बंधन । तूं सोडवावया योग्य दशानन । मी तुझी सून राया जाण । धर्मता वचन बोलतसें ॥३३॥ राया तूं पूज्य आम्हांसी । तूं श्वशुर पितयासम होसी । आज्ञा देई स्वभवनासी । जावयासी लंकेशा ॥३४॥ रावण म्हणे काय तूं मत्पुत्रभार्या । ते म्हणे सत्यचि जाण राया । तुझे अग्रजात्मजाची जाया । राक्षसराया सत्य मानीं ॥३५॥ राया करितें विनवण । मज सोडावें त्वरेंकरून । याकारणें साष्टांग नमन । चरणवंदन करितें तुझें ॥३६॥ नळकुबेरेसीं संकेत । केला असे राया जाण निश्चित । वाट पाहत असेल तिष्ठत । वेगीं मुक्त करीं मातें ॥३७॥ एखादा बलात्कार करिता मजवरी । तेथें तूं सोडविसी सुरारी । स्वधर्में भोगावी आपली नारी । दुःख भारी परस्त्रियेचें ॥३८॥ ऐसें रंभेंचें विनीत वचन । उपेक्षोनि तो दशानन । जैसें पंडिताचें शब्दरत्न । सांडी हेळसून मूर्ख जो ॥३९॥ जैसें पापिया नावडे सत्य । रोगिया नावडे पथ्य । तस्करा नावडे ताराकांत[1] । मूर्खा पंडित नावडे ॥४०॥ वेदबाह्य जो त्या नावडे वेद । अज्ञानिया नावडे ज्ञानबोध । दुर्जना नावडे मित्रसंवाद । कृपणा आत्मवाद नावडे ॥४१॥ मूर्खासि नावडे ज्ञान । अभक्ता नावडे हरिकीर्तन । आळशिया नावडे स्वधर्माचरण । पाखांडिया दानधर्म नावडे ॥४२॥ ऐशिया हो लंकानाथा । नावडे स्वहिताची कथा । रंभेसि करून बलात्कारता । झाला पीडिता भ्रमोनी ॥४३॥ रंभेसि पाडोनि शैलातळीं[2] । बळेंचि भोगिली ते काळीं । भ्रष्ट आरभणें कांचोळी । माथेची जाळी तूटली ॥४४॥

भ्रष्ट झालेली रंभा पतीच्या घरी आली : रंभा विनवी कर जोडून । सोडीं लंकेशा मी जाईन । मग ती रावणें मुक्त करून । निजभवना चालिली ॥४५॥ मार्गीं जातां ते सुंदरी । माथेचे केश सांवरी । डोईचा पालव[3] निजकरीं । सरसा सुंदरीयें पैं केला ॥४६॥ ऐसी लज्जित भीत अंगना । निघाली पतिभवना । मार्गीं करित विवंचना । काय कैसें होईल ॥४७॥ ऐसें चिंतीत आपण । पावली पतीचें भवन । दोनी चरणां करोनि नमन । लज्जायमान होवोनि ठेली ॥४८॥

नलकुबेराला रंभेकडून वृत्तनिवेदन : नलकूबेर म्हणे तियेसी । काय वर्तलें भद्रे सांग मजपासीं । येरी म्हणे स्वामी येतां निजभवनासी । रावणें मजसीं देखिलें ॥४९॥ सैन्यासहित दशानन । पर्वतापाठारीं उतरला जाण । तेणें मजला बलात्कार करून । रात्रीं मैथुन संपादिलें ॥५०॥ अगाध बळें लंकापती । मी सुकुमार योषिताजाती । म्यां विनविला नाना उपपत्ती[4] । अति काकुळती पैं आलें ॥५१॥ गुरु श्वशुरा पितयासमान । ऐसीं वचनें हेळसून । मजसीं रमला दशानन । पापात्मा पूर्ण जाणिजे ॥५२॥

संतप्त नलकुबेराचा रावणाला शाप : रंभेचे ऐकोनि वचन । चित्ते संतप्त नलकूबेर जाण । अत्यंत झाला क्रोधायमान । लाक्षारंगासमान नेत्र केले ॥५३॥ क्षण एक धरोनि ध्यानस्थिती । ध्यानीं आणिला गिरिजापती । सर्वेचि तोय घेवोनियां हातीं । मंत्रिता झाला ते काळीं ॥५४॥ करीं घेवोनि उदकातें । शापिता झाला रावणातें । म्हणे रंभेवेगळे जे स्त्रियेतें । धरितां निश्चये मरसील ॥५५॥ रंभेवेगळी जे नारी । धरितां मृत्यु पावे सुरारी । ऐसा शाप देखोनि ते अवसरीं । उदक करींचें सांडिलें ॥५६॥

देवादिकांना आनंद : नलकूबरें देतां शाप । देवांसि सुख झालें अमूप । आकाशींहूनि वर्षती

---

शब्दार्थ – १. चंद्र, २. पर्वताच्या पायथ्याशी, ३. पदर, ४. युक्तींनी.

पुष्प । दुंदुभिवाद्यें वाजती ॥५७॥ ग्रह आदिकरोनि सुरगण । करिते झाले आनंदें गर्जन । म्हणती झाले आमुचें कारण । म्हणोनि टाळिया पिटिती ॥५८॥ एका जनार्दना शरण । श्रीरामकथा पुण्यपावन । धन्य ऐकती तयांचे श्रवण । धन्य वदन वदतियांचें ॥५९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणरंभासंगमनलकूबेरशापो नाम त्रिंशत्तमोऽध्याय: ॥३०॥ ओंव्या ॥५९॥

## अध्याय एकतिसावा

॥ श्रीरामकृष्णाभ्यां नम: ॥

### सुमाळीचा वध

रावणाचे अमरावतीला आगमन : निशी क्रमितां कैलासीं । रंभासंयोगें शाप रावणासी । देवोनि नलकूबरें त्यासी । पुढें कथा कैसी वर्तली ॥१॥ राक्षसें सांडोनि कैलास । ससैन्य सपुत्रबंधु स्वर्गास । चालिला मार्गीं अमरपुरास । ठाकोनि आला ते वेळीं ॥२॥ येवोनि अमरपुराबाहेरी । राक्षस गर्जना करिती थोरी । घोष ऐकोनि वृत्रारी । कंपायमान पैं झाला ॥३॥

इंद्राने चतुरंग सैन्य सिद्ध केले : आला ऐकोनि रावण । इंद्र झाला चलितासन । बोले देवांप्रति आपण । सिद्ध सैन्य करा वेगीं ॥४॥ आदित्य बारा वसु आठ । अकरा रुद्र व्हावे एकवट । सिद्ध विश्वेदेव मरुद्गण सगट । करा उद्भट युद्धातें ॥५॥ सन्नद्ध करा सैन्यसंपत्ती । आजि युद्धीं जिंतों पौलस्ती । इंद्रवचन मानोनि समस्तीं । युद्धलागीं सिद्ध झाले ॥६॥ वरदबळें न जिंके रावण । जो कां प्रतापें महेंद्रसमान । जेणें पृथ्वीतळ अवघें जिंकोन । स्वर्ग घ्यावयालागून पैं आला ॥७॥

इंद्राची विष्णूंना प्रार्थना : ऐसें इंद्रें मनीं विचारून । आपणासी न पुरवे रणांगण । धांवत विष्णूपासीं आला जाण । सकळ वर्तमान सांगितलें ॥८॥ इंद्र म्हणे विष्णूसी । काय करूं अमरपुरीसी । वेढोनि सकळ राक्षसीं । युद्धा रावण पैं आला ॥९॥ सैन्य शस्त्रें वरदेंकरून । अति बळिष्ठ दशानन । तो न जिंतवे आम्हां दु:ख दारुण । ओढवलें जी स्वामिया ॥१०॥ तूं आपुलें वचन सत्य करीं । पूर्वी मारिले नाना वैरी । नमुचि वृत्र बळी नरकेसरी[1] । तुंवा मारिला हरिण्यकशिपु ॥११॥ हे समस्तही तुवां वधिले । तैसे पाहिजे रावणा केलें । हा अन्यत्र[2] न मरे तुजवेगळे । मरण नाहीं रावणा ॥१२॥ तुजवेगळा नारायणा । मृत्यु नाहीं या रावणा । तरी सत्य करा आपुलिया वचना । मी तरी दीन पैं तुझे ॥१३॥

इंद्राला विष्णूचे आश्वासन : ऐकोनि इंद्राचें वचन । विष्णु झाला सुखसंपन्न । म्हणे सुरपति सावधान । वचन प्रमाण मानीं माझें ॥१४॥ वरदबळें दशशिरें । जिंतिलीं दैवदैत्यांचीं पुरें । यासि निघतां रणीं म्यां त्वरें । मारीलें पाहिजे या काळीं ॥१५॥ हा बळियाढा लंकानाथ । शिववरदें झाला उन्मत्त । यासि मारीन न लागतां क्षणांत । समयोचित पैं नव्हे ॥१६॥ जरी करीन मी याचें हनन । तरी हा काळ नव्हे जाण । ब्रह्मवचना लागे दूषण । संत सज्जन अनुचित म्हणती ॥१७॥ यथाकाळीं पौलस्त्यासी । मारीन इंद्रा सहसंपत्तीसीं । संतोषवीन सुरवरांसीं । भार पृथ्वीचा फेडीन ॥१८॥ सबंधु सपुत्र दशानन । मारीन पुढें यथाकाळीं जाण । इतुकें विष्णू बोले तंव राक्षसगण । युद्धालागून प्रवर्तले ॥१९॥

---

शब्दार्थ - १. श्रेष्ठ, २. दुसऱ्याकडून.

देव-राक्षसांचे युद्ध : चहूंकडे धांवती राक्षस । आनेआन[1] करिती बहुवस । तंव अमरराजसैन्य[2] कर्कश । हाणिती शस्त्रें परस्परें ॥२०॥ देव आणि राक्षसगण । मिसळलें संग्रामा दारुण । करिते झाले तेणें गगन । बाणेंकरोन भरियेलें ॥२१॥ राक्षासांमाजी बळियाढे वीर । देवांमध्ये परम शूर । करीते झाले घोरांदर । नाना शस्त्रें प्रेरूनी ॥२२॥ रावणाचे आज्ञेवरून । राक्षस धांवले कोण कोण । ऐका तयांची नामाभिधानें । संकळित मार्गे सांगतसें ॥२३॥ मारीच प्रहस्त महोदर । महापार्श्व अकंपन निकुंभ वीर । शुक सारण त्रिशरा खर । सुहृद धूमकेत नांवाचे ॥२४॥ महादंष्ट्र महामुख । जंबुमाळी विरूपाक्ष देख । शतघ्न यज्ञकोप दुर्मुख । दूषण करवीर सूर्यशत्रु ॥२५॥ महाकाय अतिकाय देवांतक । सुमाळी आणि नरांतक । सकळ राक्षस होवोनी एक । नाना शस्त्रें देख प्रेरिती ॥२६॥ देव दैत्य एकवटले । परस्परें युद्धा प्रवर्तले । शस्त्रास्त्रें वर्षते झाले । ऐकमेकां लक्षोनी ॥२७॥

सुमाळीने केलेला देवसैन्याचा संहार पाहून अष्टवसूंनी त्याच्याशी युद्ध आरंभिले : तयाउपरी सुमाळी राक्षस । क्रोधा चढला बहुवस । संग्राम करितां देवां त्रास । अत्यंत तेणें दिधला ॥२८॥ अमरसैन्य भंगा गेलें । त्रासोनियां पळतें झालें । तें अष्टवसूंनीं देखिलें । आश्वासिलें वीरांसी ॥२९॥ पळूं नका रहा स्थिर । रणभूमीस धरा धीर । मज कोपलिया कोण वीर । समरांगणीं राहेल ॥३०॥ ऐसें सवित्रवसु बोलिला । पळतयां वीरां नाभिकार[3] दिधला । समरांगणीं उभा ठेला । नाना शस्त्रें प्रेरित ॥३१॥ शस्त्रांवरी शस्त्रें वर्षत । बाणांवरी बाण सोडित । वैरसैन्य त्रासोनि तेथ । पळतें झालें चहूंकडे ॥३२॥ क्षुद्रां मृगां पंचानन । विभांडी आपुले पराक्रमें-करून । तैसें सवित्रवसूनें राक्षससैन्य । समरांगणीं मारिलें ॥३३॥ राक्षससैन्य पावलें त्रास । देखोनि सुमाळी राक्षस । पुढे झाला रुद्रावेश[4] । दंत दाढा रगडीत ॥३४॥

सवित्रवसू व सुमाळी यांचे द्वंद्वयुद्ध : सुमाळी सवित्रवसू रणांगणीं । बाण सोडिती ऐकमेकां लक्षोनी । एकमेकांचे वर्म भेदोनी । हाणिताती परस्परें ॥३५॥ तदनंतर दोघे जण । संग्राम करिती दारुण । दोघे वीर बळसंपन्न । पराक्रम गहन दोघांचा ॥३६॥ वसुवीर बळियाढा । चढवोनियां धनुष्या मेढा । बाणशतक लाविलें तेणें धडाडा । सारथि रथ भंगिला ॥३७॥ न लागता अर्ध क्षण । सारथि रथ झाला चूर्ण । कित्येक राक्षस गतप्राण । शरजाळें पैं झाले ॥३८॥ ऐसी वसूनें करोनि ख्याती । मग सुमाळी वधावयाचे अर्थी । गदा घेतली रविनिशा-पती । काळिमा पावती कोळसे जैसे ॥३९॥ करीं धरोनि गदा जाण । कठिण काळ दंडा-समान । लागतां भूगोळ झाला भग्न । तेज दारुण पैं जिचें ॥४०॥

सुमाळीचा वध : ते गदा तुळोनि निजकरीं । टाकिली सुमाळिमस्तकावरी । शिर तुटोनियां अंबरीं । उसळलें ते काळीं ॥४१॥ चंद्रसूर्य चिंतातुर मनीं । म्हणती नाहीं आजि पर्वणी । राहु येतो आम्हांलागूनी । भक्षावया अकाळीं ॥४२॥ शिर पडोनि धरणीवरी । गदा बैसोनि रक्तप्राशन करी । शोभती झाली जैसी अंबरीं । विद्युल्लता प्रभेकरीं ॥४३॥ सुमाळीचा वध झाला । सुरसमुदाय जय पावला । राक्षसांसी पळ सुटला । धीर न धरवे ते काळीं ॥४४॥ जैसें कां तडागींचें जळ । फुटल्या धांवे अति चंचळ । तैसें त्या राक्षसांचे दळ । भयेंकरोनि पळालें ॥४५॥ सुमाळी रणीं पडिला । अस्थिमांसाचा ठाव पुसिला । कीं भूतगणीं भक्षिला । हें न कळे ते वेळीं ॥४६॥ ऐकतां हरिनामाचा ध्वनी । पातकें पळती दिशा लंघूनी । तैसे ते राक्षस समरांगणीं । धीर न धरितां पळाले ॥४७॥ एका जनार्दना शरण। पुढें मेघनादा शक्रा युद्ध

---

शब्दार्थ - १. अनन्वित, २. इंद्रसैन्य, ३. अभयवचन, ४. शंकराप्रमाणे.

दारुण। होईल तें सज्जनीं सावधान। श्रवण केलें पाहिजे ॥४८॥ सुरस कथा रामायणी। वदली वाल्मीकाची वाणी। अक्षरें महादोषां खंडणी। पवित्र अवनी पैं करी ॥४९॥ स्वस्ति श्रीभावार्थ-रामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सुमालिवधो नाम एकत्रिंशोऽध्यायः ॥३१॥ ओंव्या ॥४९॥

## अध्याय बत्तिसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### इंद्र-रावण-युद्धाला प्रारंभ

इंद्रजिताचे युद्धार्थ आगमन : सवित्रवसूनें सुमाळी। मारिलासे रणकल्लोळीं। अस्थिमांसाची झाली होळी। मेळविला धुळी राक्षसांसहित ॥१॥ ऐकोनि रावणाचा ज्येष्ठ सुत। क्रोधा चढलासे बहुत। नेत्र करोनि आरक्त। युद्धा प्रवर्तत ते समसीं ॥२॥ पळत्या देवोनि नाभीकार। आपण रणांगणीं राहिला स्थिर। कनकरथीं जडित धुर। पोंवळ्यांचीं चाकें हो ॥३॥ रथीं जुंपिले वारू। पवनातें म्हणती स्थिरू। स्वइच्छेनें चराचरू। चरणातळीं दडपिती ॥४॥ आर्धीच ते श्यामकर्ण। पाखरिले[1] भूषणेंकरून। पताकीं झांकोळलें गगन। तेजें लोपोन जाय हो ॥५॥ ऐसिया कनकदिव्यरथीं। आरूढला सुलोचनापती[2]। दिव्य शस्त्रें घेवोनि हातीं। गर्जना करित निघाला ॥६॥ ऐसा देखोनि रिपुकुमर। पळाले दश दिशांसी सुर। समरांगणीं धरितां धीर। थरथरां वीर कांपती ॥७॥ शैलारीनें[3] ऐसें देखोन। सैन्यातें देतसे आश्वासन। भिऊं नका या शब्देंकरून। पळतयांतें स्थिरावलें ॥८॥

जयंत व इंद्रजिताचे युद्ध : वज्रपाणि म्हणे वीरांसी। पुत्र करितो संग्रामासी। तुम्हीं रहावें त्याचे पाठीसीं। निमेषेंसीं रिपु पराभवील ॥९॥ तदनंतरें ते अवसरीं। शक्रसुत जयंत नामेंकरीं। बैसला कनकरथावरी। धुरेसि सारथि अति कुशळ ॥१०॥ त्वरेंकरोनि रथ प्रेरिला। जेथें मेघनाद तेथें आला। राक्षसपुत्र देखोनि प्रवर्तला। राजपुत्रासीं समरांगणीं ॥११॥ एकावरी एक वर्षती बाण। एकावरी एक शस्त्रें सोडिती दारुण। एकाचे एक निवारोनि पूर्ण। पुनरपि संधान पैं करिती ॥१२॥ शक्रपुत्राचें सुटतां बाणजाळ। भेदलें समग्र राक्षस-दळ। कित्येक खोंचले बंबाळ। रक्ताचे पूर चालिले ॥१३॥ शक्रसुतें काय केलें। सैन्य एकवटोनि आपुलें। अमोध शस्त्रांतें सोडिलें। अवकाश नाहीं अंबरीं ॥१४॥ शतघ्नी तोमर बाण। गदा खड्ग मुद्गल दारुण। शृंगें शिखरें पादप पाषाण। मेघनादावरी टाकिले ॥१५॥ देवसैन्याचा थोर मार। राक्षस खोंचती बाहे रुधिर। जिकडे पळती रजनीचर। तिकडे अमरेंद्रपुत्र मारितसे ॥१६॥ मनोवेगाहूनि बहुत। इंद्रपुत्र फिरवी रथ। राक्षससैन्य भस्म करित। चौताळत दशदिशा ॥१७॥

पुलोमाने जयंताला पळविले : सुरेंद्रपुत्रें आनेआन केलें। शत्रुसैन्य पराभविलें। तदनंतर पुलोम दैत्यें वेळे। रणीं धरिलें इंद्रपुत्रा ॥१८॥ वेगीं वाहोनि खांद्यावरी। अकस्मात निघाला सागरीं। हें देखोनि उभयतां वीरीं। थोर आश्चर्य पैं केलें ॥१९॥ तो आजा होय शक्रसुतासी। शचीचा पिता श्वशुर इंद्रासी। तेणें नेलें जयंतासी। देखोनि देव दुःखी झाले ॥२०॥ राजपुत्र धरोनि नेला। सुरसैन्या पळ सुटला। मेघनादें पळतिया वीरांला। अति सुबद्ध गांजिलें ॥२१॥ देवसैन्य पुढे पळत। राक्षस मागें शस्त्रें मारित। पळत पुढें हाका देत। धांव धांव देवेंद्रा

शब्दार्थ - १. झुली घालून तयार, २. इंद्रजित, ३. इंद्राने.

॥२२॥ राक्षस विजयी जाहले । स्वपुत्रातें धरोनि नेलें । ऐसें देखोनि इंद्रा चढलें । कोपाचें भरितें अनिवार ॥२३॥

इंद्राचे युद्धार्थ आगमन : सारथियासी म्हणे शचीपती । रथ आर्णी गा शीघ्रगतीं । तंव मातलीनें तेचि समयाप्रती । स्यंदन[1] आणिला रत्नजडित ॥२४॥ रथीं आरूढोनि इंद्र आपण । केलें मेघासारिखें गर्जन । पुढें जातां अपशकून । अमरावतीस पैं झाले ॥२५॥ वैरियावरील पवन । लागला वज्राऐसा कठिण । पुढें जाता रथाचे वारू मेटें वळून । भूमीलागून बैसले ॥२६॥ मनीं शंकला अमरपती । पुढें चालिला शीघ्रगतीं । सर्वे आदित्यरुद्रवसुगण अमिती । शस्त्रें झळकतीं सतेज ॥२७॥ शस्त्रें झोडीत वज्रपाणी[2] । प्रवेशला रणांगणीं । तंव येरीकडे मेघनादजनक[3] तेच क्षणीं । रथावरी बैसला ॥२८॥

रावण व कुंभकर्णाकडून देवसैन्याचा संहार : जया रथा निर्माण करिता । विश्वकर्मा जाण तत्वतां । तयाची वर्णितां सुंदरता । तरी सुवर्णमय तो असे ॥२९॥ रथीं राक्षसचूडामणी । परिवेष्टित पन्नगसैन्यीं । जयाचे गर्जनें अवनी । उलंडों पाहे तळावरी ॥३०॥ दैत्यनिशाचरपरिवेष्टित । रथीं आरूढोनि रणपंडित । आवेशें वैरियासमोर येत । जैसा भास्कर पूर्वदिशे ॥३१॥ मेघनादाहूनि मागिलेकडे । स्वयें ठाण मांडोनि पुढें । धनुष्या चढवोनियां मेढे । अनेक बाण टाकिले ॥३२॥ देव राक्षस परस्परीं । युद्ध करिती रणसागरीं । शस्त्रें वर्षती जैसे अंबरीं । मेघ दाटले अकाळीचें ॥३३॥ तदनंतर कुंभकर्ण । दुरात्मा अति दुर्जन । नाना शस्त्रांचें प्रेरण । करितां झाला कोणा न कळतां ॥३४॥ कुंभकर्णाचें घोर संधान । बाणें तोडिता झाला करचरण । कित्येक सुर निर्गतप्राणे[4] । रणमंडळीं पडिले ॥३५॥

रुद्र व आदित्यांकडून राक्षसांची दाणादाण : मग ते आदित्य निशाचर । कोपा चढले परस्पर । करिते झाले दुर्धर मार । एकमेकांची वर्मे लक्षोनी ॥३६॥ याउपरीं सुरवरीं । राक्षसां केली घेघेमारी । पळतां न पळवे राक्षसवीरीं । धाकें प्राण सांडिले ॥३७॥ कित्येक गतप्राण पडिले । कित्येकां सर्वांगी बाण लागले । कित्येक भूमीवरी केश मोकळे । लोळताती रणांगणीं ॥३८॥ कित्येक धाकें पळत । कित्येक योद्धे नव्हे म्हणत । कित्येक बोलती आम्ही मार्गस्थ । तीर्थयात्रे हिंडतों ॥३९॥ राक्षस रणीं पडिले जाण । सहित वारू गजगण । शस्त्रें पोटीं कवटाळून । बीभत्स वीर पडियेले ॥४०॥ बाबरझोंटी विशाळ मुख । दंत दाढा विक्राळ देख । हात पाय पसरोनि संमुख । रणांगणीं पडियेले ॥४१॥ अमरगण जय पावले । निशाचर रणीं भंगले । हें देखोनि दशग्रीवा भरलें । कोपाचें अति भरितें ॥४२॥ आपुले राक्षस समरांगणीं । पडिले देखे प्रेत होवोनी । तयांच्या शोणिताचा[5] पूर लोटोनी । दोहीं तीरीं वाहतसे ॥४३॥ रणीं मिनले गीध घार । मांस भक्षिती तोडिती शरीर । मस्तकावरी खगवर[6] । चंचूनें तोडिती नेत्रांतें ॥४४॥

इंद्र व रावणाचे तुंबळ युद्ध : ऐसें रावणें देखोन । उरले सैन्येसीं युद्ध दारुण । करिता झाला आपण । पाचारोन देवांतें ॥४५॥ येरीकडे अमरपती । उत्तम धनुष्य घेवोनि हातीं । ओढितां नादें त्रिजगतीं । पालथी होऊं शके क्षणमात्रें ॥४६॥ शक्रे धनुष्यीं चढविला गुण । अग्निवर्ण हेमपुंख बाण । टाकिला रावणाच्या मस्तकीं जाण । तो भूमीलागोन पडियेला ॥४७॥ तदनंतरें लंकापती । जयाच्या बळाची त्रिजगी कीर्ती । तो धनुष्यीं बाण लावी शीघ्रगतीं । शक्रधनुष्य

---

शब्दार्थ - १. रथ, २. इंद्र, ३. रावण, ४. प्राण जाऊन, ५. रक्ताचा, ६. पक्षी.

छेदिलें ॥४८॥ इंद्राच्या रथावरी अमित बाण । सोडिता झाला दशानन । तेणें अंधार पडिला जाण । शक्रा कांहीं न कळेचि ॥४९॥ शक्ररावणांचे युद्ध । घोरांदर होईल प्रसिद्ध । एका जनार्दनीं प्रबोध । परमानंद प्रकटेल ॥५०॥ रणीं राक्षसांसी मुक्ती । अनेकां करीं देतो रघुपती । दीनजन उद्धरावया काकुळती । अवतार धरी श्रीराम ॥५१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरककांडे एकाकारटीकायां इंद्ररावणयुद्धप्रारंभोनाम द्वात्रिंशोऽध्याय: ॥३२॥ ओंव्या ॥५१॥

## अध्याय तेहतिसावा

॥ श्रीरामचंद्राय नम: ॥

### रावणाची सुटका व इंद्रबंधन

रावणाची प्रतिज्ञा : राक्षसां देवा संग्राम घोर । हा रामा तुझ्या मायेचा बडिवार । राक्षसदेवांच्या शरीं अंबर । भरुनी अंधकार दाटला ॥१॥ कोणा कोणी न दिसे स्पष्ट । तम दाटलें अति उत्कृष्ट । वीरें वीर पावले कष्ट । तयांत तिघे सावध ॥२॥ एक राक्षस दुजा राजकुमर । तिजा इंद्र धनुर्वाडा दुर्धर। परस्परें करिती रणमार । घाय दुर्धर हाणिती ॥३॥ सारथिया म्हणे रावण । ऐकें गा तूं एक वचन । माझे सकळ राक्षसगण । विबुधीं रणीं पाडिले ॥४॥ आजि माझ्या क्रोधेंकरून । करीन त्रैलोक्याचें दहन । सारथिया शीघ्र स्यंदन । नेईं सैन्याचे आदिअंतवरी ॥५॥ शीघ्र आजि समरांगणीं । शत्रूंची धडें लोळवीन रणीं । माझिया प्रतापाची करणी । असत पावती शत्रुनक्षत्रें ॥६॥ मी ऊर्ध्व उचलीन हात । तंव आकाशास भय बहुत । माझेनि धाकें वायु त्वरित । उकडील तिकडे नव जाय ॥७॥ तरी सारथिया चिंता न करीं । माझा रथ ने तेथवरी । जेळें उदय होय तमारी[1] । तेथपर्यंत चालवीं ॥८॥ ऐकोनि रावणाचे वचन । तो सारथि गुणनिधान । मनोवेगातें मार्गे टाकून । वारूंसीं रथ मध्ये आणिला ॥९॥

रावणाला पकडण्याची इंद्राची देवांना आज्ञा : ऐसें जाणोनि त्रिदशपती[2] । रथावरून देवांप्रती । म्हणता झाला तो सावधवृत्तीं । ऐका माझे मनींचें हो ॥१०॥ आजचि या संग्रामांत । रावण दळें बळें झाला उन्मत्त । यासि न मारून जीवें जीत । धरून नगराप्रत न्यावें ॥११॥ ऐसें बोलोनि अमरचूडामणी । प्रवेशला तो रणांगणीं । नाना आयुधें नाना बाणीं । रिपुदळणीं घेतलीं ॥१२॥ रावणाचे दक्षिणभागीं । उभा दीक्षित शतक्रतु[2] यागी । उभयतां सेना शतयोजन रणरंगीं । शस्त्रयुद्धीं सज्ज असे ॥१३॥

रावण देवांच्या बंधनात : देवांचें सैन्य अगाध । तयामाजी इंद्र प्रबुद्ध । बाण सोडिले तेजोमय विविध । रावणसारथिरथ भंगिला ॥१४॥ एकला रावण रणभूमीसीं । सांपडला हो देवांसी । भ्रांत झाला न स्मरे मानसीं । हें देखोनि राक्षसीं हाक दिधली ॥१५॥ हा हा करिती निशाचर । म्हणती मेला गेला दशशिर । कीं भस्म केला देवीं समग्र । कीं रणसागरीं बुडविला ॥१६॥ तदनंतर मेघनाद । ऐकोनि राक्षसांचा शब्द । पिता धरिला हें वचन सुबद्ध । हृदयवर्मीं आदळलें ॥१७॥

इंद्रजिताची गर्जना : क्रोधें झाला मूर्च्छापन्न । दोनी खात दाढा दशन[3] । हात चुरी दोनी चरण । पृथ्वीवरी घांसितसे ॥१८॥ नेत्र झाले क्रोधें आरक्त । चळचळां सर्वांग कांपत । म्हणे ब्रह्मांडाच्या उतरंडी येथ । पालथ्या करोनि सांडीन ॥१९॥ म्हणे सोमसूर्य फुंकोन पाडूं । कीं नक्षत्रांसहित

शब्दार्थ - १. सूर्य, २. इंद्र, ३. दांत.

गगन तोडूं । कीं या विरंचीचा खेळ मोडूं । कीं ध्रुव पाडूं आकाशींचा ॥२०॥ कीं या चराचराची बांधूं मोळी । कीं एकवीस स्वर्ग समुद्रजळीं । कीं मेरूसहित दिग्गज[1] पायांतळीं । रगडोनि रांगोळी करूं आजी ॥२१॥ कीं मंगळमातेचें[2] उदर चिरूं । कीं सप्तसागरांचा घोंट भरूं । कीं कूर्माची पाठी शतकूट करूं । हे अवनी धरिली म्हणोनी ॥२२॥

**इंद्रजिताने माया सोडून रावणाला सोडविले :** रुद्रावेशें राजकुमर । युद्धा प्रवर्तला दुर्धर । शुक्रें दिधली होती माया घोर । ते घातली वैरियावरी ॥२३॥ ते मायेचें सांगतां विंदान । अथवा करितांही वर्णन । तरी ते मुळींच लटिकी जाण । तिसी सत्यपण असेना ॥२४॥ ऐसिया मायेतें विबुधारी । घेवोनियां मग गर्जना करी । प्रेरिता झाला वैरियावरी । तेझें वृत्रारि मोहिला ॥२५॥ मेघनादें सोडोनि सर्व सैन्य । जेथें मरुद्गणसिंह होता मेघवाहन । तेथें येवोनि पिता रावण । रिपूपासोन मुक्त केला ॥२६॥ अमरनाथ न गणी रिपुपुत्रासी । जेंवी पंडित पाखांडियासी । तंव मेघनादें त्या समयासी । थोर आश्चर्यासी पैं केलें ॥२७॥

**इंद्राचा रथ भंग केला :** सुवर्णपुंखी तीक्ष्ण शर । सोडिता झाला दशाननकुमर । तेणें इंद्ररथाचे वारू चूर । रथ मोडोनि दूर पाडिला ॥२८॥ इंद्र झाला ते काळीं विरथ । सवेंचि ऐरावतीं आरूढ होत । अति मायावी रावणसुत । काय सांगूं रघुराजा ॥२९॥ कृपाळुवा अवनिजापती । तुझी अतर्क्य माया अतर्क्य स्थिती । तुवां अवताराची घेवोनि बुंथी । नाना खेळें खेळसी ॥३०॥ या ब्रह्मांडातें स्रजिता । तों कुमरू तुझा तत्वतां । जेणें हे मही घेतली माथां । तो तुझ्या अंगाखालता दडाला ॥३१॥ योगियांचा मुकुटमणी । ज्यातें म्हणती शूळपाणी । तो तुझे पायांचें पायवणी[3] । वंदोनि नाम स्मरतसे ॥३२॥ कुंभोद्भव म्हणे श्रीरघुनाथा । वेदशास्त्रां न कळे तुझी कथा । साही दर्शनें विवादतां । तुझिया अंता न पावती ॥३३॥ करोनि मायेचे विंदाना । इंद्र भुलविला रणांगणा । शर वर्षे तें न दिसे जाणा । खेदातें मन पावलें ॥३४॥ क्षतें क्षीण देखोनि देवेंद्र । तें समयीं धांवला राजकुमर । अवचिता धरोनि अमरेंद्र । गळां बंधन पैं केलें ॥३५॥ आपणा धरिलें होतें म्हणून । ते संधि रावणें साधून । करिता झाला शस्त्रप्रेरण । मरुद्गण[4] लक्षोनी ॥३६॥ राक्षसीं इंद्र रणीं धरिला । भेणें सुरां पळ सुटला । कित्येकांचा संहार रावणें केला । उरले ते पुरीं प्रवेशले ॥३७॥ रथावरोनि शक्रजित । पितयासी येथोनि चला म्हणत । आम्हांसी झाला जय प्राप्त । कोणे कार्या येथें रहावें ॥३८॥ मेघनाद म्हणे पितयासी । हा ज्वर होता माझे मानसीं । तो निरसला शिवकृपेसीं । इंद्राव धरितांचि ॥३९॥ मी देवांचा दर्पहरण[5] । त्रैलोक्य माझेनि कंपायमान । इंद्रा धरोनि मनोरथ पूर्ण । आजि माझे पैं झाले ॥४०॥ आजिपासोनि त्रैलोक्य । आम्ही भोगूं आवश्यक । आता युद्धाची उत्कंठा देख । आम्हांसि नाहीं राजेंद्रा ॥४१॥ ऐसें पुत्राचें वचन । ऐकोनियां दशानन । पुनरपि म्हणे पुत्रा दृढ बंधन । करीं दक्षिणपुरीस[6] नेतां ॥४२॥ ययासि लंकेसी पैं नेतां । देव येतील सोडवावया तत्वतां । हेही न घडे परी रक्षितां । आळस न कीजे मेघनादा ॥४३॥ अमरपुरीस इतकें करून । इंद्रासि गळां बांधोन । विदारोनि देवसैन्य । स्वसैन्येंसीं निघाले ॥४४॥ वाजंत्रांच्या नाना ध्वनी । गुढिया मखरें उभवोनी । पुरीं प्रवेशले स्वभवनीं । राक्षसेंद्र पैं आला ॥४५॥ गृहीं प्रवेशोनि रावण । समस्तां आज्ञा दिधली जाण । श्रमलेति युद्ध करितां दारुण । विश्रांति घ्यावी निजमंदिरीं ॥४६॥ ऐसें राक्षसराज बोलिला । समस्तां आज्ञा देवोनि प्रवेशला । नगरजनां

---

शब्दार्थ – १. ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम, सुप्रतीक, २. पृथ्वीचे, ३. तीर्थ, ४. देवसमूह, ५. गर्व हरण करणारा, ६. लंकेला.

उत्साह झाला । मंगळतुरें वाजती ॥४७॥ एका जनार्दना शरण । रावण प्रवेशला लंकाभवन । इंद्रातें करोनि बंधन । संरक्षण करविलें ॥४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रावणइंद्रबंधनलंकाप्रवेशो नाम त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥३३॥ ओंव्या ॥४८॥

## अध्याय चौतिसावा

॥ श्रीपतितपावनाय नमः ॥

### अहल्या-आख्यान

ब्रह्मदेवाचे लंकेला आगमन : पूर्वप्रसंगीं दशाननपुत्रें । धरोनि नेलें इंद्रातें । तें देखोनि सुरवर दुःखार्ते । पावले बहुत संग्रामीं ॥१॥ समस्त सुरवर मिळोन । येवोनि प्रार्थिला चतुरानन । म्हणती भ्रष्ट झालें अमरसदन । इंद्र धरून नेला लंकेसीं ॥२॥ तुझिये वरदें राक्षस । उन्मत्त झाले बहुवस । तेणें मेघनादें आम्हांसि देवोनि त्रास । लंके अमरेश धरून नेला ॥३॥ ऐकोनि देवांचें वचन । आश्चर्य पावला चतुरानन । मग समस्त देव मिळोन । लंकाभवन पावले ॥४॥ ब्रह्मा आला ऐकोन वाणी । राक्षसराज सामोरा येवोनी । पूजा अभिवंदनें करोनी । मग ब्रह्मा मंदिरासी नेला ॥५॥ रावण म्हणे जी स्वामिनाथा । कोणीकडे आलेति समर्था । येरू म्हणे तुझ्या पुत्राची प्रशंसता । ऐकोनि येथें पैं आलों ॥६॥ तुझिया पुत्राचा पराक्रम । ऐकोनि सुख झालें परम । याचे तुळणेसीं वीरीं विक्रम । ब्रह्मांडामाजि पैं नाहीं ॥७॥ येणें जिंतोनि त्रिभुवन । केलें सर्व आपणाअधीन । प्रतिज्ञा येणें सत्य करून । इंद्रा बांधोन् आणिलें ॥८॥ याच्या देखोनि पुरुषार्थातें । मी प्रसन्न झालों जाण येथें । जो मागसी त्या वरातें । ये काळीं मी देईन ॥९॥ इंद्र आणिला जिंतोन । यास्तव इंद्रजित हें अभिधान । मग म्हणे दशानन जाण । तुझा पुत्र परम भाग्याचा ॥१०॥ या इंद्रातें करोनि मुक्त । स्थापीं आपुला आज्ञांकित । देवांसहित हा अंकित । झाला असे समरांगणीं ॥११॥

अमरत्वाची मेघनादाची मागणी : ऐकोनि प्रपितामाहाचें वचन । काय बोलिला मेघनाद आपण । म्हणे स्वामी झालासी प्रसन्न । तरी अमरपण मज देईं ॥१२॥ जरी मज अमरत्व देसी । तरी मी सोडिन इंद्रासी । मी आणिक तुजपासीं । मागत नाहीं पदार्थ ॥१३॥ मेघनादमुखींचें वचन । ऐकोनि ब्रह्मा हास्यवदन । काय बोलिला तें सावधान । श्रोतृजनीं परिसावें ॥१४॥

ब्रह्मदेवाचे प्रत्युत्तर : ब्रह्मा म्हणे इंद्रजिता अवधारीं । जो जन्मला जननीजठरीं । तयासि काळ लागला पैं मारी । अमरत्व कैसेनि लाधेल ॥१५॥ जो आकारातें आला । तो जाण नाशातें पावला । जो जननीजठरीं[1] नाहीं आला । तो अमर झाला सर्वस्वें ॥१६॥ नादुबिंदा होतां भेटी । तो गर्भ वाढे मातेच्या पोटीं । जातक[2] वर्तविती शेवटीं । तो जाईल निश्चितीं जाणिजे ॥१७॥ मार्कंडेय भृशुंडी रोमहर्षण । हंस कूर्म बहु आयुष्याचे जाण । परी ते काळें जर्जर करून । मरणमार्गीं लाविले ॥१८॥ आणि स्थावर जंगम चराचर भूतें । हींही पावती लयातें । मी सृष्टिस्रजिता परी मातें । काळ न सोडी जाणावें ॥१९॥ मरण चुकावें म्हणोन । हिरण्यकशिपें केला प्रयत्न । परी शेवटीं तो निधन । यथाकाळीं पावला ॥२०॥ याकारणें गा राजकुमरा । प्रारब्धीं लिहिलें न चुके चतुरा । चतुष्पद द्विपद तेही मरणद्वारा । काळाच्या घरा जातील ॥२१॥

---

शब्दार्थ - १. मातेचें पोटीं, २. ग्रहांचे शुभाशुभ फल.

इंद्रजिताने वर मागून घेतला : ऐकोनि चतुराननाचें वचन । इंद्रजित म्हणे ऐका विज्ञापन । तुमच्या बोलें इंद्रा सोडीन । परी मागेन तें द्यावें ॥२२॥ वैरियासीं युद्ध रितां समरांगणीं । संकट मांडल्या मज रणीं । होम करीन मंत्र जपोनी । अवदानें अग्नि संतुष्ट ॥२३॥ होम करीन शत्रुविजयार्थ । तेथोनि निघावा अश्वासहित रथ । त्यावरी बैसतां मज अमरत्व । सहज होईल ते काळीं ॥२४॥ ऐसा माझा मनोरथु । सिद्धि पावावयां तूं समर्थु । ब्रह्मा म्हणे तथास्तु । चिंतिलें पावसी राजपुत्रा ॥२५॥

इंद्राची सुटका व त्याचे स्वलोकी गमन : तदनंतरें मेघनादें । इंद्रा सोडिले अति आल्हादें । सकळ देवांसी सुरेंद्रें । अमरावतीस गमन केलें ॥२६॥ तयाउपरी श्रीरघुपती । शक्र येवोनि स्वलोकाप्रती । चिंतातुर होवोनि श्रमांतीं । मुख अत्यंत कोमाइलें ॥२७॥ लज्जान्वित चिंतातुर मन । ते समयीं चतुरानन । म्हणता झाला पूर्वदृष्कृतस्मरण । आठवीं गा अमरेंद्रा ॥२८॥ म्यां विधात्यानें पुरंदरा । रचिलें या चराचरा । नरां सदृश केलें नरां । स्त्रियांसारिख्या स्त्रिया केल्या ॥२९॥

अहल्येची कथा : कोणी न देखेच सुंदर । मग झालों चिंतातुर । मग म्यां भूतें केलीं नानाकार । जंगमादिस्थावरपर्यंत ॥३०॥ या समस्तांचें सुंदरपण । एकवटिलें न लागतां क्षण । तयाचें करीन कन्यारत्न । निश्चय पूर्ण मनीं केला ॥३१॥ विधाता म्हणे ते अवसरीं । सौंदर्याची निर्मिली कुमरी । नाम अहल्या सुंदरी । पुढें कैसी झाली परी[1] तें ऐका ॥३२॥ अहल्येची यापरी उत्पत्ती । झालीसे गा अवनिजापती । तिचा पिता विधाता म्हणती । प्रसिद्ध शास्त्रीं बोलिजे ॥३३॥ धरणिजापति म्हणे इल्वलारी[2] । तुवां उदधि प्राशिला आचमनेंकरीं । विंध्याद्रि निजविला पृथ्वीवरी । अद्यापवरी देखतसों ॥३४॥ यास्तव मागें महामुनी । अहल्येची उत्पत्ति ऐकिली कानीं । परंतु पुनः तुझ्या मुखेंकरूनीं । ऐकावी म्हणोनि पुसतसें ॥३५॥ अगस्ति म्हणे अयोध्यापती । दिवसेंदिवस झाली वाढती । वर मिळाले पृथ्वीपती[3] । देवगंधर्व ऋषीश्वर ॥३६॥ ऐसे समस्त मीनले । चंद्र इंद्र यम सूर्य आले । तपोधनही तेथें मिळाले । कन्याशा मनीं धरोनी ॥३७॥ ऐसें जाणोनि चतुरानन । करिता झाला एक पण । म्हणे प्रथम येईल मेरुप्रदक्षिणा करून । त्यासी देईन अहल्या ॥३८॥ ऐकोनि ब्रह्मयाची वचनोक्ती । समस्त चालिले प्रदक्षिणार्थी । इंद्र चढोनि ऐरावतीं । लाहेलाहें[4] निघाला ॥३९॥ वरकड समस्त ऋषीश्वर । प्रदक्षणेसीं निघाले सत्वर । मागें गौतमें काय केले चतुर । पंडित जनीं अवधारिजे ॥४०॥ गोप्रसूतिकाळ देखोन । उभयतोमुखीतें प्रदक्षिणून । आला चतुराननें जाणोन । कन्यादान गौतमा केलें ॥४१॥ प्रदक्षिणा करोनि सकळ सुरवर । तयांपुढें आला इंद्र । तंव अहल्येसी सांगे गौतम भ्रतार । देखोनि इंद्र कोपला ॥४२॥ इंद्र म्हणे ब्रह्मयासी । आम्हांहूनि शक्ति गौतमासी । आधीं आला म्हणोनि अहल्येसी । कन्यादानासी पैं केलें ॥४३॥ चतुरानन म्हणे अमरनाथा । गोप्रसूतिकाळीं येणें तत्वतां । प्रदक्षिणा केली ती मेरुसीं समता । म्हणोनि दुहिता तया दिधली ॥४४॥ उभयतोमुखींची प्रदक्षिण । ते मेरुप्रदक्षिणेसमान । ऐसें जाणोनि कन्यारत्न । गौतमालागोन दिधलें ॥४५॥ यापरी अहल्यापाणिग्रहण । गौतमासी झालें जाण । तो राग इंद्रे मनीं धरून । कपटें छळण मांडिलें ॥४६॥ अहल्येसीं गौतमें जाण । सूर्यग्रहणीं केलें स्नान । पुढें अहल्या आश्रमीं एकटी जाण । तें संधीं इंद्र प्रवेशला ॥४७॥

---

शब्दार्थ – १. स्थिती, २. हे अगस्ती, ३. राजे, ४. जलदीजलदीने.

स्नान करोनि अहल्या मंदिरीं । एकली असतां इंद्र पापाचारी । गौतमवेष धरोनि ते अवसरीं । कामसंचारीं प्रवेशला ॥४८॥ रति मागोनि तियेसी । इंद्र विचरता[१] अधर्मासी[२] । तंव द्वारीं येवोनि उभा ऋषी । दोहींच्या संयोगासी देखिलें ॥४९॥ देखोनि दोहींचें पापाचरण । ऋषीनें दोघां शाप दारुण । देवोनि तपा निघाला जाण । त्याचें शापलक्षण अवधारा ॥५०॥ अहल्या विनवी कर जोडून । इंद्र तुमचे वेषें रमोन । मज न कळेचि कपटपण । क्षमा संपूर्ण मज कीजे ॥५१॥ ऐकोनि अहल्येचें वचन । तत्काळ द्रवला तो कृपाघन । म्हणे इक्ष्वाकुकुळीं रघुनंदन । स्वयंवरा जातां उद्धरील स्पर्शें ॥५२॥ परद्वारिणी परम नष्टे । परपुरुषासीं रमलीस भ्रष्टे । शीघ्र शिळा होईं पापिष्ठे । या आश्रमामाझारीं ॥५३॥ अहल्या जाहली शिळा । भगें आलीं इंद्राच्या कपाळा । यालागीं कोणी कोणाचे छळा । न प्रवर्तावें देवेंद्रा ॥५४॥ शिळारूपें तपःस्थिती । केली अहल्येनें नेमस्ती । उत्कृष्ट तप जाणोनि रघुपती । चरणस्पर्शे उद्धरिली ॥५५॥ पुनीत झाली देखोनि अंगना । गौतमें अंगीकारिली जाणा । पुढें इंद्रा तुझ्या कथना । सावधाना अवधारीं ॥५६॥ ऋषिशापें गेली कळा । हीनत्व आलें वीर्यबळा । मुकलासी ऐश्वर्या सकळा । बांधोनि गळां राक्षसीं नेला ॥५७॥ तया पापाचें फळ । तुज प्राप्त झालें प्रबळ । जैसी निर्दैवांला अवदशा केवळ । ठाकोनि ये घर पुसत ॥५८॥ जैसी निर्दैवाची संपत्ती । विषयासक्ताची तपःस्थिती । नपुंसकाची घरवादप्रीती । अंधाप्रती दीप जैसा ॥५९॥ परांगनास्पर्शाचेनि पापें । तुझी संपत्ति यश हरपे । क्रियाभिमान तुझा करपे । दुःखें अमूपें[३] भोगिसी ॥६०॥ तुझें राज्य न होईल स्थिर । तूं हिंडसी देशदेशांतर । मनुष्यलोकीं तुज स्थिर । वास नोहे रहावया ॥६१॥

**ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून इंद्राने यज्ञ केला :** ब्रह्मा म्हणे इंद्राप्रती । तूं याग करीं विष्णु-प्रीत्यर्थी । तेणें तुज यश कीर्ती । आणि श्रीमंती पावसी ॥६२॥ विष्णुप्रीत्यर्थ करीं यज्ञ । संतृप्त होती देवब्राह्मण । तेणें तुज होय कल्याण । हितवचन मी सांगतों ॥६३॥ तुझा पुत्र धरोनि नेला । तो क्षीरसागरीं स्वस्थ राखिला । तयाची ग्लानि वेळोवेळां । निजमानसीं धरूं नको ॥६४॥ इतुकें ब्रह्मयाचें ऐकोनि वचन । इंद्रें याग आरंभिला प्रीत्यर्थ भगवान । आचार्या अध्वर्या पाचारून । दीक्षाग्रहण पैं केलें ॥६५॥ गार्हपत्य दक्षिण आहवनी । तिन्ही अग्नि स्थापिले तिहीं स्थानीं । आचार्य ब्रह्मा मिळोनी । यापरी याग साधिला ॥६६॥ इंद्रें करोनि अवभृथस्नाना । ब्राह्मणां दिधलें कोटिगोदानां । सुखी केलें विश्वजना[४] । श्रीभगवानाप्रीत्यर्थ ॥६७॥ यापरी यज्ञ सिद्धी पावला । सकळां देवां संतोष झाला । तदनंतरें पुष्पवर्षाव केला । महावाद्यें वाजविलीं ॥६८॥ येरीकडे श्रीरघुपती । थोर विस्मयो झाला चित्तीं । म्हणे अगा ये स्वामी अगस्ती । हरीची माया दुर्धर ॥६९॥

**मायेची दुर्धरता :** मायेनें इंद्रा छळिलें । पराशराचें तप ढाळिलें । शंकराहातीं नरपाळ दिधलें । भिक्षा मागे घरोघरीं ॥७०॥ चंद्रासी कळंक लाविला थोर । शापें भस्म केले सगर[५] । सरस्वती पाठीं लागला पितर । जो चराचरांचा पैं कर्ता ॥७१॥ पांडवां देशवटा[६] भारी । हिंडती दीनें वनांतरीं । भृगूची पुलोमा सुंदरी । मायावी दैत्य नेत होता ॥७२॥ द्रौपदी पतिव्रता-शिरोरत्न । तीसही कष्ट झाले गहन । चांडाळ कौरवीं वस्त्रे हिरोन । सभेमध्ये उभी केली ॥७३॥ ऐसें मायेचें विंदान । सुरवरां न कळेचि लक्षण । तेथें आम्ही रंक दीन । काय जाणों मायेतें ॥७४॥ ऐसें बोलिला श्रीरघुपती । तया उत्तर दे अगस्ती । पुढिले अध्यायीं तयाची

शब्दार्थ - १. प्रवृत्त झाला असता, २. पापकर्माला, ३. पुष्कळ, ४. सर्व लोकांना, ५. सगरराजाचे साठ हजार पुत्र.

स्थिती । तयाप्रती सांगेल ॥७५॥ एका जनार्दना शरण । इंद्रअहल्येचें आख्यान । सांग जाहलें संपूर्ण । जनार्दन निजनकृपा ॥७६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां इंद्रअहल्याख्यानं नाम चतुस्त्रिंशोऽध्याय: ॥३४॥ ओंव्या ॥७६॥

## अध्याय पस्तिसावा

॥ श्रीदीनोद्धारणाय नम: ॥

### हनुमंताचा प्रताप

मागिले प्रसंगीं शक्रजितें । मैत्री करोनि सोडिलें इंद्रातें । तदनंतरें सीताकांतें । अगस्तीतें विनविलें ॥१॥ श्रीराम दोनी कर जोडून । अगस्तीस विनवी नम्र होऊन । म्हणे स्वामी वाळिरावणांचे बळासमान । भूमंडळीं आन[1] असेना ॥२॥ या दोघांच्या बळाहूनि अधिक । वायुपुत्र असे देख । तयाचा पराक्रम सम्यक । जम ठाऊक असे जी ॥३॥

श्रीरामांची मारुतीबद्दलची कृतज्ञता : हनुमंताच्या प्रसादेंकरून । प्राप्त लंका सीता लक्ष्मण । येणें सुग्रीवेंसीं सख्य जाण । अगणित बळ पैं याचें ॥४॥ शुद्धीस जातां सहित वानरेंसीं । समुद्र देखोनि कपि चिंतातुर मानसीं । तो शत योजनें येणें पराक्रमेंसीं । उतरोनि लंका पावला ॥५॥ सीतेसी करोनि एकांत । वन उपडोनि किंकरप्रधानपुत्रघात । आणि लाडका जो अखया सुत । त्याचा नि:पात येणें केला ॥६॥ सीताशुद्धी येणें केली । वन उपडोनि राक्षसें मारिलीं । ब्रह्मशापें बांधों देवोनि बळी । केली होळी लंकेची ॥७॥ इंद्रजितंजनकें शक्ति टाकिली । तेणें लक्ष्मण पडिला भूतळीं । येणें द्रोणगिरी आणोनि त्या वेळीं । सौमित्रातें वांचविलें ॥८॥ याचेनि सुग्रीवासीं सख्य झालें । अठरा पद्में वानर मेळविले । याचेनि मजला रूप आलें । ऐसे उपकार केले हनुमंतें ॥९॥ याचे ऐसे उपकार । मजवरी झाले मुनि अपार । परी येणें वाळीवानर । किंनिमित्त वधिला नाहीं ॥१०॥ ऐसे याचें बळ अद्भुत । देवां दानवां अतुळित । परी येणें नाहीं मारिला शक्रसुत[2] । काय कारण मुनिवर्या ॥११॥ ऐसी आशंका माझे चित्तीं । वसत आहे गा मुनि अगस्ती । सुग्रीवकार्यासी मारुती । कांही नाहीं प्रवर्तला ॥१२॥ ऐसें श्रीरामाचें उत्तर । ऐकोनि अगस्ति चतुर । काय बोलिला तें सविस्तर । श्रोतीं सादर ऐकिजे ॥१३॥

मारुतीची जन्मकथा : अगस्ति म्हणे श्रीरघुपती । बाळपणीं याची अद्भुत ख्याती । ते मी सांगेन तुजप्रती । अद्भुत शक्ती हनुमंता ॥१४॥ ब्रह्मचर्याची अति गोमटी । हनुमंतास गर्भ-कासोटी । अंजनीमाता न देखें दृष्टी । कां राम जगजेठी देखेल ॥१५॥ हनुमंताचें लिंगदर्शन । मुख्य माता न देखे जाण । मग इतर देखों शके कवण । ब्रह्मचारी पूर्ण वायुकुमर ॥१६॥ हनुमान पुसे बाळभावें । माते म्यां क्षुधेसी काय खावें । आरक्त फळ जें देखावें । तें भक्षावें म्हणे माता ॥१७॥ जन्मतांचि हनुमंत । अग्नितेजें देदीप्त । बालार्कप्रभासम भासत । दीप्तिमंत मारुति ॥१८॥ सूर्योदय नव्हतां तेथ । सेजे निजवोनि हनुमंत । अंजनीं गेली वनांत । फळें त्वरित आणावया ॥१९॥ मातृविहीन हनुमंत । रुदन करी अतिक्षुधित । देखेनि बालार्क[3] आरक्त । फळ भक्षावयार्थ उडाला ॥२०॥ क्षुधेनें पीडिला प्रबळ । बाळसूर्य अति वर्तुळ । भक्षावया स्वयें तत्काळ । उडे चपळ स्वभावें ॥२१॥ हनुमंताची उड्डानशक्ती ।

---

शब्दार्थ - १. दुसरा, २. वाळी, ३. बालसूर्य.

ते गति न ये खगेश्वराप्रती[1] । वायुसुताच्या शीघ्रगतीं । मनोवृत्ती टणकल्या[2] ॥२२॥ भक्षावया बालार्कासी । दुर्धर गति हनुमंतासी । देखोनि विस्मय सुरवरांसी । देव ऋषि विस्मित ॥२३॥ धैर्य शौर्य महावीर्य । शीघ्र गमन गतिगांभीर्य । हनुमंताचें परमौदार्य । सुरासुर वानिती ॥२४॥ हनुमंताच्या समान शक्ती । कोणा नाहीं त्रिजगतीं । बाळभावें शीघ्रगती । सूर्यभक्षार्थीं धांवत ॥२५॥ मनोगती सांडोनि मागें । हनुमान चालिला वेगें । सूर्यकिरणाचेनि योगें । होईल सर्वांग भस्मांत ॥२६॥ ऐसें जाणोनि वायुपिता । निजपुत्रातें संरक्षिता । हिमांबुकणी[3] निववविता । होय चालता शिशूमागें ॥२७॥ वायु धरूं पाहे हनुमंतासी । तंव तो नाटोपे वायूसी । वेगें जातां सूर्यापासीं । फळभावेंसीं भक्षावया ॥२८॥ हनुमंत आला बिंबापासीं । रविराहुग्रहण ते दिवसीं । राहु ग्रासितां सूर्यासी । हनुमंतासी कोप आला ॥२९॥ माझ्या गोड ग्रासाआड । तेथें कोण आला मूढ । राहूचें फोडिलें जाभाड । पुच्छें सदृढ गांजिला ॥३०॥ पुच्छें हाणतां वानरा । घायें राहु झाला घाबरा । नाकीं मुखीं रुधिरधारा । थरथरा कांपत ॥३१॥ धांकें थरथरां कांपत । गगनीं गरगरां भोंवत । राहू पडतां अति मूर्च्छित । तरी धांवोन केत धरी त्यासी ॥३२॥ राहू केतू अति आप्तता[4] । दोघां देहीं एकात्मता । केतु येवोनि राहुसाह्यार्था । कोपें हनुमंताकडे पाहे ॥३३॥ कोप राहू देखोनि दृष्टी । रागें हनुमान हाणी मुष्टी । दोघां पळतां पाय पोटीं । बोंब उठी ग्रहचक्रीं ॥३४॥ ग्रह सांगती सिंहिकासुता । पृच्छकेतु आला तुम्हांभोंवता । इंद्र अधिकारी नियंता । त्यासि तत्वतां तुम्ही सांगा ॥३५॥ राहु जो कां सिंहिकासुत । वनरघायें रुधिरोक्षित[5] । इंद्रापासीं आला त्वरित । शंख करीत सांगावया ॥३६॥ माझी जीविका जीवनवृत्ती । चंद्रसूर्यग्रहणस्थिती । आजिचे ग्रहणकाळाप्रती । रविग्रहणार्थी मी गेलों ॥३७॥ तंव मजहूनि बळवंत । पुच्छराहु येवोनि तेथ । घायें करोनि रुधिरोक्षित । धाडिलों येथ बोंबेसीं ॥३८॥ तूं नियतां देवाधिदेवो । माझा न देखतां अन्यावो । तुंवा धाडिला पुच्छरावो । तेणें मज पहाहो गांजिलें ॥३९॥ शेखीं मजही न सांगता । त्वां करणी केली गुप्त घाता । म्यां काय करावें आतां । मज तत्वतां तूं सागें ॥४०॥ पुच्छराहु येवोनि तेथ । सूर्य आकळिला समस्त । माझा करूं धांवे घात । आलों रडत सांगावया ॥४१॥ ऐकोनि राहूचा वचनार्थ । इंद्रादि देव झाले विस्मित । ग्रहचक्रांत म्हणती हें विपरित । कर्ता येथे तो कोण ॥४२॥ कोणें केला नवा राहो । त्यासि निर्दळावया पहाहो । घेवोनि सुरसेनासमुदावो । इंद्र स्वयमेवो पैं आला ॥४३॥ इंद्रें राहु पुढें करून । नवा राहु दाखवीं म्हणोन । जेणें तुज गांजिलें [illegible]र्ण । त्याचें निर्दळण करीन मी ॥४४॥ दाखवितां हनुमंतासी । थरथरां कंप सुटला राहूसी । दडोनि ऐरावतींचे पाठीसीं । दावी इंद्रासी दुरोनि । ॥४५॥ येरीकडे हनुमंत । धांवला रवि ग्रासावया क्षुधित । तेणें सूर्य चळीं कांपत । अति अनर्थ ओढवला ॥४६॥ दिनमान साडोनि नभःपथा । पहों न लाहे सविता । निवारूं न शके हनुमंता । अति आकांता पावला ॥४७॥ तेचि संधी इंद्रापासीं । वानर देखोनि राहूसी । रागें निर्दळावया त्यासी । अति आवेशीं धांवला ॥४८॥ मज क्षुधिताच्या आहारासी । राहू ओढवला विवसी[6]। धरोनि इंद्राच्या बळासी । माझ्या ग्रासासी घेऊं आला ॥४९॥ ऐसें बोलोनि हनुमंत । सूर्याग्रासाची सांडोनि मात । राहूचा करूं धांवे घात । येरू बोभात[7] इंद्रासी ॥५०॥

शब्दार्थ – १. गरुडाला, २. थकल्या, ३. थंड पाण्याच्या बिंदूनीं, ४. मैत्री, ५. रक्तबंबाळ, ६. राक्षसी, ७. हाका मारी.

राहु पळे इंद्राकडे । तंव हनुमंताची उडी पडे । येरू अति आक्रोशें रडे । इंद्रापुढें सांगत ॥५१॥ राहु म्हणे मातें मर्दित । इंद्र इंद्र नामें आक्रंदत । वानरें पुरविला अंत । आरंबळत[1] आक्रोशें ॥५२॥ ऐकोनि राहूचा आकांत । इंद्र नाभिकार देत । भिवों नको धरीं पुरुषार्थ । याचा घात मी करीन ॥५३॥

इंद्र व बालहनुमंताचे युद्ध : ऐसें बोलोनि अमरपती[2] । वेगीं प्रेरिला ऐरावती । त्यावरी धांवला मारुती । हस्ते हस्ती उपटावया ॥५४॥ वानर ऐरावती आकळी । त्यातें पुच्छें ठोकिला कुंभस्थळीं । गज आक्रंदोनि किंकाळीं । चळचळीं कांपत ॥५५॥ पुच्छ नव्हे तो व्रजाघात । घायें विमुख ऐरावत । इंद्र बळे आंवरित । तरी युद्धाआंत परतेना ॥५६॥ पुच्छा हाणितां वानरें । गजें घेतलें घायवारें । शक्रशक्तीतें नावरे । केलें घाबरें इंद्रासी ॥५७॥ इंद्र देवांमाजी बळी । करितां हनुमंतासीं कळी । वानरें मुकुट पाडिला तळीं । झोंटी[3] मोकळी सुटली ॥५८॥ मुकुट घ्यावया आपणासी । बाळभावें न कळे त्यासी । इंद्र केला कासाविसी । मरुद्गणेंसी मर्दूनी ॥५९॥ इंद्र गांजिला कपींद्रें । यम धांविन्नला कैवारें । दंडें हाणी सत्वरें । केलें वानरें विपरीत ॥६०॥ यम जंव हाणी दंडासी । हनुमान आदळला[4] अंगासीं । थापा हाणोनियां त्यासी । तोंडघसीं पाडिला ॥६१॥ घाय हाणोनी प्रचंड । सांडवोनि दंडबंड । यमाचें ठेचिलें तोंड । बळ वितंड वानरा ॥६२॥ यमें गांजिलें जगासी । हनुमंतें गांजिलें तयांसी । घायें मिळविला धुळीसी । उठावयासी बळ नाहीं ॥६३॥ यम गांजिला दारुण । भेणें पळला वरुण । कुबेर घाली लोटांगण । चरणां शरण कपिराजा ॥६४॥ हनुमंतें अर्धक्षणीं । सुरवरसैन्या केली भंगाणी[5] । अवघ्यां केली दाणादाणी । महापळणी देवांसी ॥६५॥ हनुमंताच्या वेगापुढें । आम्हीं पळावें कोणीकडे । येरामागें येरु दडे । जीवा सांकडें देवांसी ॥६६॥ सगज उपटावया इंद्रासी । ऐरावत धरोनि पुच्छासीं । वानरें भोवंडिला आकाशीं । सदेव ऋषी गजबजिले ॥६७॥ हनुमंतें देखोनियां दृष्टीं । इंद्र उपडिला सृष्टीं । जगीं एकचि बोंब उठी । महाहटी वानर ॥६८॥ लघु लाघवें सुरपतीं[6] । वज्रें हाणितला मारुती । घाव लागला हनुमंताप्रती । पडियेला क्षितीं[7] मूर्च्छित ॥६९॥

हनुमंत मूर्च्छित. वायूच्या क्षोभाने प्राणवायूचा निरोध : मेरुशिखरपाठारांत । हनुमान पडिला मूर्च्छित । वायु पिता येवोनि त्वरित । निजसुत उचलिला ॥७०॥ क्षुधिता माझिया तान्हयासी । इंद्रें हाणोनि वज्रासीं । मूर्च्छित पाडिलें भूमीसीं । वायु मानसीं क्षोभला ॥७१॥ वायु क्षोभला संपूर्ण । आकर्षिला जगाचा प्राण । ब्रह्मादिकां संकट पूर्ण । ऋषिभूतगण तळमळती ॥७२॥ वायु क्षोभोनि सक्रोध । अंतरीं केला प्राणरोध । प्राणापान ठेलें स्तब्ध । अति विरुद्ध देवांसी ॥७३॥ प्राणनिरोधाची स्थिती । ठेली भूतांची नित्यगती । कोणा नाहीं सुखप्राप्ती । तळमळ करिती अति दुःखें ॥७४॥ यक्षराक्षसगणगंधर्व । सिद्धचारणादि मानव । सत्यलोका येवोनि सर्व । पितामह[8] वंदिला ॥७५॥ एका जनार्दना शरण । शरण देवांचा वर लाहोन । वज्रदेही होईल हनुमान पूर्ण । सावधान अवधारा ॥७६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां हनुमंतप्रतापवर्णनं नाम पंचत्रिंशोऽध्यायः ॥३५॥ ओंव्या ॥७६॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

शब्दार्थ – १. ओरडत, २. इंद्र, ३. केश, ४. भिडला, ५. नाश, ६. इंद्राने, ७. पृथ्वीवर, ८. ब्रह्मदेव.

# अध्याय छत्तिसावा

॥ श्रीगणपतये नमः ॥

## हनुमंताला वरदान

प्राणनिरोधामुळे सर्वांना पीडा : समस्तदेवऋषिपंक्ती । प्राणरोधें तळमळती । येवोनि प्रार्थिला प्रजापती । देव विनंती करिते झाले ॥१॥ प्राणनिरोधाचे कष्ट । ऋषी सांगती श्रेष्ठ श्रेष्ठ । तंव ब्रह्मयाचें फुगलें पोट । अति संकट देवांसी ॥२॥ गगनीं लागलें पोट । बोल बोलतां होती कष्ट । मळमूत्रा तेथें कैंची वाट । अति संकट देवांसी ॥३॥ ब्रह्मा स्वयें सांगे समस्तां । इंद्रें हाणोनि वज्राघाता । मूर्च्छित पाडिलें हनुमंता । वायु पुत्रार्था[1] क्षोभला· ॥४॥ राहूचे कैवारें अमरनाथें । वज्र हाणिलें वायुसुतातें । पुत्र पडतांचि चाळिता वायु । तो तंव जगाचा जगदायु । पुत्रलोभें क्षोभोन बहु । भूतां आकांत मांडिला ॥६॥

प्राणवायूचे महत्त्व : प्राणापानीं नित्य सुख । प्राणें प्राण्या नित्य हरिख । प्राण जातां निःशेख । परम दुःख प्राणियां ॥७॥ प्राण गेलिया निघोनी । काष्ठप्राय प्राणी जनीं । दृष्टी पाहतांचि सचैलस्नानीं । विटाळ मानी जग त्याचा ॥८॥ यालागीं प्राणें पवित्रता । प्राणें प्रीति प्रीतिवंता । प्राण गेलिया तत्वतां । प्रिया प्रियकांता स्पर्शेना ॥९॥ पत्नी प्रिया परम आप्त नित्य । एकांतीं भोगी जीवित । प्राण गेलिया मानी प्रेत । पतीस भूत म्हणे पत्नी ॥१०॥ प्राण प्रिय समस्तां । तो क्षोभोनि जाईल आतां । यालागीं वांचवावें हनुमंता । वैकुंठनाथा सांगोनी ॥११॥ प्राणें पीडला शूळपाणी । वायूची करावया बुझावणी । तोही आला तत्क्षणीं । वांचवावया हनुमंता ॥१२॥

वायूजवळ ब्रह्मा, विष्णू व महेश प्रार्थना करण्यासाठी आले : शिव शक्र[2] चतुरानन । तिहीं प्रार्थिला जनार्दन । हनुमंता द्यावया जीवदान । अवघे जण निघाले ॥१३॥ ब्रह्मा हरि हर तिघे जण । सवें इंद्रादि देवगण । ऋषिश्रेष्ठ प्रजा पूर्ण । अवघे जण तेथें आले ॥१४॥ तंव तेथें घेवोनि हनुमंत । वायु बैसलासे रडत । प्राणरोधें क्रोधयुक्त । आले समस्त त्या ठायां ॥१५॥ देखोनि ब्रह्मा हरि हर । वायु उठोनियां सत्वर । कडिये घेवोनि कुमर । केला नमस्कार सद्भावें ॥१६॥ एकपुत्रघाताकारणें । अवघें जगचि निर्दळणें । ऐसें न करावें आपणें । क्षमा करणें प्राणनाथा ॥१७॥ वायु बोले क्षोभकर्ता । माझा हनुमंत हा न उठतां । करीन इंद्रियांच्या घाता । जाण तत्वतां प्रजापते ॥१८॥

देवांचे मारुतीला वरदान : ऐकोनि वायूचें वचन । हास्य करी श्रीजनार्दन । हनुमंताच्या भाग्यें पूर्ण । जन्ममरण या नाहीं ॥१९॥ श्रीरामभागाच्या द्विगुणित[3] । भाग्य पावला हनुमंत । त्यासी स्वप्नीं नाहीं मृत्य । चिरंजीव मारुति ॥२०॥ वरद वदला जनार्दन । तें ऐकोनि त्रिनयन । वरद वदे संतोषोन । सावधान अवधारा ॥२१॥ माझिया तृतीयनेत्रींचा वन्ही । जाळों न शके तयालागूनी । त्रिशूळ न शके जाय भेदोनी । वरदवाणी शिवाची ॥२२॥ विष्णु वरद वदे तत्पर । गदा बाण दुर्धर चक्र । तेणें न भंगे याचें शरीर । अजरामर[4] मारुति ॥२३॥ ब्रह्मा वदे निजवरदासी । ब्रह्मदंड ब्रह्मशापासीं । बाधूं न शके मारुतीसी । सकळ द्वंद्वासीं निर्मुक्त ॥२४॥ इंद्र वदे निजवरदासी । माझें वज्र लागलें हनुमंतासी । तेणें वज्रांग नांव ययासी । होईल सर्वांसीं विख्यात ॥२५॥ माझें वज्र न बाधी पाहीं । हा होईल वज्रदेही । सुरासुरां नागवे पाहीं । ख्याति तिहीं लोकीं याची ॥२६॥ हृषीकेशीकमळमाळा । सुर्को नेणे

शब्दार्थ – १. मुलाकरता, २. इंद्र, ३. दुपटीने, ४. जरामरणरहित.

कदा काळा । इंद्रें उल्लासें तया वेळां । घातली गळां हनुमंताचें ॥२७॥ निजवरद वदे सविता । मजहूनि शताधिकता[1] । तेजोवृद्धि होईल वायुसुता । राक्षसघाता करावया ॥२८॥ हा वांछील सज्ञानता । तरी सकळ वेदशास्त्रार्थां । मी देईन अति योग्यता । होईल व्याख्याता परमार्थीं ॥२९॥ वरुण वदे वरदान । वरुणजळें निमग्न । होतां हनुमंता न ये मरण । शापबंधन कदा न बाधी ॥३०॥ यम वरद वदे वितंड । सुख पावसी तूं प्रचंड । तुज बाधी ना यमकाळदंड। आरोग्य अखंड अजरत्वें ॥३१॥ धनेश वदे निजवरदासी । युद्ध करितां वर्षानुवर्षीं । कदाकाळीं श्रम न पावसी । शस्त्रबाधेसीं बाधवेना ॥३२॥ विश्वकर्मा वदे वरदान । म्यां शस्त्रें केलीं निर्माण । तिहीं हनुमंतासी युद्धीं जाण । शस्त्रबंधन न बाधी ॥३३॥ माझें शिल्पशास्त्रज्ञान । तें तू पावसी संपूर्ण । ऐसें बोलेनि आपण । दे आलिंगन हनुमंता ॥३४॥ ब्रह्मा जगद्गुरु सर्वांसी । संतोषोनियां वेगेंसीं । म्हणे हनुमंत भाग्याची राशी । सकळ देव त्यासीं तुष्टले । ॥३५॥ धीर वीर महाशूर । पराक्रमी हा वज्रशरीर । बाधूं न शके महाशूर । पराक्रमी हा वज्रशरीर । बांधू न शके शस्त्रसंभार । वायो तुझा पुत्र सभाग्य ॥३६॥ थोर भाग्य हनुमंता । भेटोनि सुखी करील सीता । गांजोनियां लंकानाथा । सुखी रघुनाथा करील ॥३७॥ परम भाग्य हनुमंता । भेटोनि सुखी करील सीता । शुद्धि आणोनियां तत्वतां । श्रीरघुनाथाही सुखी करील ॥३८॥ तुझा पुत्र हा आतुर्बळी । घेईल इंद्रजितासीं फळी । करोनि राक्षसां रवंदळी । लंकाहोळी करील ॥३९॥ श्रीरामाच्या कटकांत । अदट दाटुगा हनुमंत । सेवाबळें परम आप्त । श्रीरघुनाथ मानील या ॥४०॥ भविष्य हनुमंताची ख्याती । स्वयें सांगतां प्रजापती । उल्लास वायूचे चित्तीं । पुत्रकीर्ती ऐकोनि ॥४१॥

वर मिळाल्यावर वायूने प्राणवायू मुक्त केला : वरद लाहोनि हनुमंता । वायु अति उल्लासता । मुक्त केली प्राणरोधता । सुख समस्तां तेणें झालें ॥४२॥ सुखी झाले सुरवर । सुखी झाले ऋषीश्वर । सुखी झाले चराचर । जयजयकार तिहीं लोकीं ॥४३॥ वरद होवोनि हनुमंतासी । सुरनर गेले निजधामासी । वायूनें आणोनि हनुमंतासी । अंजनीपासीं दिधलें ॥४४॥ हनुमंताची बाळकीर्ती । विस्तारली त्रिजगतीं । फळार्थ आकळिला गभस्ती । लावली ख्याती सुरवरां ॥४५॥ मारुतीचें सामर्थ्य सिद्ध । तेंचि देवीं दिधलें वरद । हनुमंतकीर्ति अति अगाध । जेणें आल्हाद श्रीरामा ॥४६॥ जें सामर्थ्य श्रीरामासी । तेंचि सामर्थ्य हनुमंतासी । एकात्मता अहर्निशीं । लोकक्रियेसीं देवभक्त ॥४७॥ लोकक्रियासंग्रहार्थ । श्रीराम देव हनुमान भक्त । तोचि श्रीरामायणी ग्रंथ । भक्तसामर्थ्य हनुमंत ॥४८॥ डोंगरीं दावाग्नीची[2] ख्याती । घरीं दीपाची दीप्ती । दोहीं एकचि दाहकशक्ती । तेंवी देवभक्तीं सामर्थ्य ॥४९॥

हनुमंताकडून ऋषींना उपद्रव : हनुमान असतां मातेप्रती । अंगीं अद्भुत सामर्थ्यशक्ती । करित बळानें उद्धती । ऋषीं हितोक्तीं शापिला ॥५०॥ गंगातीरीं ऋषींची वस्ती । अवघे आश्रम उचलोनि हातीं । हनुमान ठेवी दूर पर्वतीं । जळ न पावती स्नानपाना ॥५१॥ ऋषी आपुले तपःसामर्थीं । पुढती गंगातीरा येती । हनुमान उचलोनि मागुती । घाली पर्वतीं अति दूर ॥५२॥ पुण्यपर्वतीं ऋषी वसत । सगळे उचलोनि पर्वत । हनुमान घाली उखराआंत[3] । ऋषी तळमळीत जळफळा ॥५३॥ बाळभावाच्या परवडीं[4] । ऋषींची यज्ञपात्रें फोडी । कुशासनें अजिनें फाडी ।

---

शब्दार्थ - १. शतपटीहूनही अधिक, २. वणव्याची, ३. ओसाड माळावर, ४. प्रकाराने.

जानवीं तोडी बटूंचीं ॥५४॥ बटु ब्रह्मचारी कवळूनि पुसीं । हनुमान उडे स्वयें आकाशीं । लेकरें करिती कोल्हाळासी । ऋषिपत्न्यांसीं तळमळ ॥५५॥ मारोनियां गजकरवडें[1] । ऋषींचे आश्रमीं सांडी मढें । काढितां शिष्य समुद्राकडे । उपाव पुढें चालेना ॥५६॥

ऋषींचे ब्रह्मदेवाजवळ गाऱ्हाणे व हनुमंताला सौम्य शाप : ब्रह्मवरदाची वरदोक्तीं । शाप न चले हनुमंतीं । अवघे ऐसे ब्रह्मयाप्रती । बुद्धि पुसती विधातिया ॥५७॥ ब्रह्मा सांगे ऋषींप्रती । शाप द्यावा अतिहितोक्तीं । मारुति भेटे जंव रघुपती । तंव तुझी शक्ती लीन राहो ॥५८॥ जेंवी आलिया तारुण्यता । यौवनें मुसमुसी वनिता । तेंवी भेटल्या रघुनाथा । निजसामर्थ्यता पावसी ॥५९॥ ऐसें ऋषीश्वर शापिती । झाली हनुमंता लीन[2] शक्ती । मग राहिला साधुवृत्तीं । ऋषींप्रती अति नम्र ॥६०॥ द्रव्यमद तारुण्यमद । अंगीं बळाचा बळमद । तेणें पुरुष होय स्तब्ध । करी विरुद्ध अवमानें ॥६१॥ व्यापार झालिया व्यापारी । नाना आनेआन करी । तोचि झालिया अनधिकारी । मग विचारी पुण्यपाप ॥६२॥ कैसी संध्या कैसे स्नान । केंवी उपजे निजज्ञान । अधिकार झालिया क्षीण । विवेक पूर्ण प्राण्यासी ॥६३॥

हनुमंताचे परिवर्तन : तैसें झालें हनुमंता । निजबलाढ्यता लीन होतां । म्यां पावावें परमार्था । साधुसंतां भजावें ॥६४॥ पूर्वी सूर्याचें वरदान । जेव्हां हनुमान वांछील ज्ञान । तेव्हांचि होवोनि सुप्रसन्न । ज्ञानसंपन्न मी करीन ॥६५॥ ज्ञान मारुति वांच्छितां । अंतरीं उगवोनि चित्सविता[3]। ज्ञान विज्ञान[4] लीनता । देहीं विदेहता श्रीरामभक्तीं ॥६६॥ ज्ञान विज्ञान[4] संतृप्ती। देहीं असोनि विदेहस्थिती । श्रीरामाच्या अनन्यभक्तीं । झाला मारुति जगद्वंद्य ॥६७॥ वालिसुग्रीवकलहाआंत । शापें हनुमंतशक्ति गुप्त । यालागीं वाळीचा न करीच घात । जाण निश्चित श्रीरामा ॥६८॥ सुग्रीव हनुमंताचा आप्त । परी शापें शक्ति होती गुप्त । यालागीं वाळीचा न करीच घात । जाण निश्चित श्रीरामा ॥६९॥ ऐसी हनुमंताची ख्याती । ऐकोनि सुखावला श्रीरघुपती । प्रीतीनें आलिंगिला मारुती । हा प्राणसखा निश्चितीं पैं माझा ॥७०॥ मुनीसी म्हणे श्रीराम । धन्य धन्य याचा पराक्रम । धन्य धन्य याचा जन्म । माझ्या अवतारा नाम याचेनि ॥७१॥

श्रीरामांचा यज्ञ करण्याचा मानस : तदनंतर श्रीरघुपती । समस्तां ऋषींसहित अगस्ती । तयाप्रती करी विनंती । ऐका वचनोक्ती पैं माझी ॥७२॥ म्यां वधिले राक्षस थोर । तेणें पातक झालें अपार । तया प्रायश्चिता अध्वर[5] । अयोध्याभवनीं करूं पाहतों ॥७३॥ माझिया यज्ञाचे सिद्ध्यर्थीं[6]। तुम्हीं साह्य व्हावें ऋषी समस्तीं । याकारणें करितों विनंती । कृपामूर्तिं मुनिराजा ॥७४॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । ऋषि म्हणती धन्य धन्य । मग श्रीरामाची आज्ञा घेऊन । निजाश्रमा ऋषी गेले ॥७५॥ तदनंतर श्रीरघुपती । सभा विसर्जून मंदिराप्रती । प्रवेशला जैसा गभस्ती। जंबुद्वीपा आड जाये ॥७६॥ सवेंचि प्रवर्तली शर्वरी[7] । श्रीरघुनाथ गेला भवना- माझारीं । गोधनें दोहती घरोघरीं । नगरनारी आनंदें ॥७७॥ एका जनार्दना शरण । पुढें गोड निरूपण । श्रीराम भक्तजनभवभंजन । नाना लीला खेळतसे ॥७८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां हनुमंतवरदो नाम षट्त्रिंशोऽध्यायः ॥३६॥ ओंव्या ॥७८॥

---

शब्दार्थ - १. हत्तींची शरीरें, २. गुप्त, ३. ज्ञानसूर्य, ४. अनुभवज्ञान, ५. यज्ञ, ६. सिद्धीस जाण्याकरिता, ७. रात्र

# अध्याय सदतिसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामगुणसंकीर्तन

सुखनिद्रित भास्करवंशभूषण[1] । जेंवी शेषशयनीं नारायण । तृतीयभाग निशी क्रमोनि भृगुनंदन[2] । पूर्वे आगमन पैं केलें ॥१॥ सुरगुरु[3] मावळला । तृतीयभाग रात्रीचा क्रमिला । पुण्यपुरुषां चेवो[4] झाल । प्रातःस्मरामि करिते झाले ॥२॥ सकळ जनां चेइरें[5] झालें । रतिसुखापासोनि सुटले । मार्गस्थ मार्गीं लागले । तीर्थयात्रा करावया ॥३॥ विप्र वेदाध्ययन करिती । गाई घरोघरीं दुभती । एकी त्या दधिमथनीं प्रवर्तती । सारासार निवडोनी ॥४॥ कागपक्षी चेइरे झाले । तमेंसीं निशीनें प्रयाण केलें । ऐसें जाणोनि गंधर्व आले । श्रीरामातें उठवावया ॥५॥ करिती सुस्वरें गायन । वीणा वेणु वाद्यें गहन । आलाप मूर्च्छना तान मान । सुरस गायन मांडिलें ॥६॥ सर्व किन्नरांची गायनध्वनी । ऐकिली श्रीरामें शयनस्थानीं । अति आनंदला मनीं । श्रीराम कीर्तनीं तुष्टला ॥७॥ पर्यंकींहूनि श्रीरघुपती । उठलियावरी समस्ती । आपुलाले प्रयोजनीं सावधान चित्तीं । होते झाले ते काळीं ॥८॥ एक पादुका पुढें ठेवोन । एक परिमळ मिश्रित जीवन । सुवर्णपात्रीं भरोन पूर्ण । समीप तिष्ठत राहिले ॥९॥ एकें दंतकाष्ठ आणिलें । श्रीरामें मुख प्रक्षाळिलें । सवेंचि स्नानतर्पण सारोनि तये वेळे । सेवकांसहित बाहेर आला ॥१०॥ आधींच तो श्रीरघुनंदन । कोटि मदनांचा गाभा पूर्ण । पूर्णावतार गुणनिधान । भक्तजीवन श्रीराम ॥११॥ कौसल्यानंदवर्धन । नगरजनां सुखवर्धन । भक्तचकोरां चंद्र पूर्ण । षोडश कळां शोभला ॥१२॥ पराक्रमें विष्णुसमान । रूप अश्विनौदेवांसम जाण । बुद्धि बृहस्पतीहूनि गहन । श्रेष्ठपण स्रष्ट्याऐसें[6] ॥१३॥ पृथ्वीसारिखी क्षमा पूर्ण । तेजें दुसरा सूर्य जाण । वेगें पाहतां मागें पवन । ठाके कोण त्यापुढें ॥१४॥ समुद्रासारिखा गंभीरू । धैर्ये जैसा पर्वत मेरू । कांति चंद्राहूनि अपारू । नृपति किंकरू जयाचे ॥१५॥ ऐसा तो अवनिजापती । सर्वे ऋषिमुनि जयांची अगाध कीर्ति । भद्रासनीं येवोन श्रीरघुपती । समस्तेंसीं बैसला ॥१६॥ दोहींकडे उभे प्रधान । आणि नगरनागरिक जन । बैसले असती गुणसंपन्न । सभा सधन घनवटली ॥१७॥ इक्ष्वाकुकुळींचा भूपती । क्षत्रियांमध्यें अगाध-कीर्ती । ऐशा श्रीरामाभंवत्या ऋषिपंक्ती । तपोधनांच्या बैसल्या ॥१८॥ जैसा स्वर्गीं सुरवर । सुधापानियांमध्यें[7] इंद्र । तैसाचि श्रीरामचंद्र । शेष[8] शत्रुघ्न भरत उभे समीप ॥१९॥ शत्रुघ्न भरत लक्ष्मण । सेवा करिती संमुख उभे ठाकोन । जैसा अध्वरीं[9] हुताशन । नाना अवदानें घेतसे ॥२०॥ किंकर सुभट सेवक । सेवा करिती प्रफुल्लितमुख । हात जोडोनि संमुख । भाट ब्रीदें वर्णिती ॥२१॥ श्रीरामाचे पार्श्वभागीं । बैसले महानुभाव योगी । वानर बळियाढे वीर ते प्रसंगीं । सुग्रीवादि अनुसरले॥२२॥ चौघां प्रधानांसहवर्तमान । सेवेसी तिष्ठत बिभीषण। जैसे कुबेरासी गुह्यक जाण । नाना पदार्थे सेविती ॥२३॥ वेदशास्त्रें संपन्न । आणि वयोवृद्ध ब्राह्मण । तयांतें सज्ञान देती मान । तैसा श्रीरघुनंदन सेविती ॥२४॥ ऐसा तो श्रीरामचंद्र । सेविताती ऋषिवृंद । एक नाना करिती वाद । एक प्रबंध पैं गाती ॥२५॥ एक करिती हरिकीर्तन । एक मंजुळ गाती गायन । एक सांगती पुराण । रामायणादिकथा हो ॥२६॥ ऐसा भक्तजनमनोरंजन । लीलाविग्रही श्रीरघुनंदन । अवतारनटनाट्य जनार्दन । स्वयें आपण दावीतसे

---

शब्दार्थ - १. सूर्यवंशाला भूषणभूत, २. शुक्र, ३. बृहस्पती, ४. जागृती, ५. रात्रीने, ६. ब्रह्मदेव, ७. देवामध्ये, ८. लक्ष्मण, ९. यज्ञी.

॥२७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामगुणवर्णनं नाम सप्तत्रिंशोऽध्याय: ॥३७॥ ओंव्या ॥२७॥

## अध्याय अडतिसावा

॥ श्रीरामचंद्राय नम: ॥

### राजांचे रामदर्शनार्थ आगमन

याप्रकारें अयोनिजारमण । भरत आणि शत्रुघ्न लक्ष्मण । सद्‌गुरु वसिष्ठाचें करोनि सेवन । राज्यकार्य चालविती ॥१॥ राज्य करितां श्रीरघुनाथा । कोणा नाहीं दैन्यवार्ता । कोणा नाहीं दैन्य चिंता । राज्यीं असतां श्रीराम ॥२॥

**जनकाचे श्रीरामांकडे आगमन :** राज्यकार्य प्रजापाळण । रात्रंदिवस करी रघुनंदन । तंव कोणें काळीं विदेह[1] पूर्ण । श्रीरामदर्शना पैं आला ॥३॥ नामविदेही रूपविदेही । देहीं पाहतां तोही विदेही । विदेहासि देहचि नाहीं । वैदेहीं[2] पाहीं कन्या ज्याची ॥४॥ ऐसा तो विदेही जनक । आला ऐकोनि वैदेहीनायक[3] । पुढे येवोनि नमस्कार सम्यक[4] । अति आदरें श्रीरामें केला ॥५॥ श्रीराम म्हणे जी विदेहनृपती । तुमचेनि आम्हां यश कीर्ती । तुमचेनि उप्रतेजें क्षितिपती । रावणादिक मारिले म्यां ॥६॥ तुमचेनि कृपेकरून । अलभ्य लाभ पावती जन । मी तरी तुमचा स्थापित दीन । परी एक वचन अवधारिजे ॥७॥ मी करीन तुमची पूजा । ते अंगीकारावी जनकराजा । रत्नाभरणें सुवर्ण वोजा । मम प्रीतीं घेईजे ॥८॥ तंव जनक म्हणे देवाधिदेवा । आम्हीं करावी तुझी सेवा । तो तूं पूजितोसि मूळींच्या भावा । लक्षोनियां राजेंद्रा ॥९॥ तुझे दर्शनें तृप्त झालों । अकल्पित फळ पावलों । येथवरी येवोनि कृतार्थ झालों । सकळ लाधलों पूजेतें ॥१०॥ तुवां केली आभरणीं पूजा । ते म्यां दोघी कन्येसीं वोजा । देतसें गा गरुडध्वजा । ऐकानि श्रीरामराजा संतोषला ॥११॥

**रामांकडून सत्कार स्वीकारून जनकाचे मिथिलेला गमन :** विदेहाचें करोनि पूजन । कित्येक दिवस अयोध्येस राहवून । मग विदेह निघाला मिथिलेसि जाण । आज्ञा घेवोन चालिला ।॥१२॥ श्रीराम म्हणे विदेहासी । प्रयाण करावें आपुले नगरासी । सवें भरत बोळवील तुम्हांसी । नगरापर्यंत दिधला ॥१३॥ ऐकोनि श्रीरामाचे वचना । जनकें श्रीरामासि करोनि प्रदक्षिणा । चालिला आपुल्या मिथिलाभवना । अति आनंदें गर्जनेसीं ॥१४॥

**कैकय देशाच्या राजाचे आगमन व त्याचा सत्कार :** तंव येरीकडे कैकयीचा ज्येष्ठ बंधु । कैकयदेशाचा प्रभु प्रसिद्धु । श्रीरामासी मातुलसंबंधु । श्रीरामदर्शना पैं आला ॥१५॥ मातुळ आला ऐकोन । श्रीराम सामोरा होऊन । करोनि साष्टांग नमन आलिंगन । दिधलें क्षेम परस्परें पुसती ॥१६॥ श्रीराम म्हणे अहो जी नृपती । आम्ही चौघे बंधु सहितीं । हें राज्य आणि संपत्ती । तुमचेनि प्रसादें भोगितसों ॥१७॥ इतुकें बोलोनि रघुराजे । मग आरंभिलें तयाचे पूजे । रत्नाभरणीं उपचार जे जे । ते मातुलासी समर्पिले ॥१८॥ धूप दीप चंदन । नाना परिमळें पूजोन । सवेंचि म्हणे श्रीरघुनंदन । आपुल्या नगरा प्रयाण कीजे ॥१९॥ वृद्ध असे नगरीं पिता । क्षोभ होईल त्याच्या चित्ता । रत्नाभरणें लक्ष्मणेंसीं त्वरिता । आपुले राज्या चालिला ॥२०॥ केकयेश्वरें करोनि प्रदक्षिणा । नमस्कार करोनि सवेंचि प्रयाणा । सांगातें घेवोनि लक्ष्मणा । आपुले नगरा निघाला ॥२१॥

---

शब्दार्थ - १. जीवन्मुक्त (जनकराजा), २. सीता, ३. राम, ४. योग्य रीतीने.

काशीपतीचे आगमन व त्याचा सत्कार : येरीकडे प्रतर्दन काशीपती । दिवोदासाचा कुमर निश्चितीं । आला ऐकोनि सीतापती । गेला चारी पाउलें सामोरा ॥२२॥ काशीपतीस देवोनि सन्मान । करोनि आलिंगन नमन । नाना उपचारीं पूजोन । श्रीरघुनंदन बोलतसे ॥२३॥ श्रीराम म्हणे काशीपती । तुझेनि दर्शनें आम्हां परम प्रीती । तुवां येवोनि सांभाळिले हे प्रीती । मोठी आम्हां तुज वाढली ॥२४॥ आतां एक करावें । रत्नाभरणां सर्वे घ्यावें । तुवां आपुल्या नगरा जावें । जें अमरादिकां दुर्लभ ॥२५॥ सुवर्णकलशांचिया हारी । महादेवें धरिली शूळावरी । अति रमणीय मणिकार्णिकातीरीं । गिरीश करी राज्य जीचें ॥२६॥ ऐसी वरुणामाझारी[1] । शिवें वसविली ते पुरी । म्हणोनि वाराणसी चतुरीं । तिये नांव बोलिजे ॥२७॥ ऐसी रमणीय काशीपुरी । तेथें जावें नृपकेसरी । येरें आज्ञा वंदोनि शिरीं । स्वसैन्येंसीं निघाला ॥२८॥

इतर आलेल्या राजांचा सत्कार : मागिलीकडे श्रीरघुनंदन । तीन शत राजे आले ऐकोन । करोनि यथाविधी पूजन । वस्त्राभरणें अर्पिलीं ॥२९॥ रायांसि म्हणे श्रीरघुपती । तुमचे कृपेनें पापमूर्ती । मरण पावला लंकापती । माझी कीर्ती करून ॥३०॥ तुमचे कटाक्षें रावण । मरण पावला सत्य वचन । परी मजवरी निमित्त ठेवून । लोक म्हणती श्रीरामें वधिला ॥३१॥ रावण मारिला रणसागरीं । सहकुटुंबप्रधानपुत्रीं । अराक्षसी[2] लंकापुरी । बिभीषणावेगळीं पैं केली ॥३२॥ जानकीचें हरण केलें । तियेनिमित्त इतुकें करणें पडिलें । ऐकोनि राजे बोलते झाले । श्रीरामेंसीं ते समयीं ॥३३॥

राजांकडून श्रीरामस्तुती : राजे म्हणती श्रीरघुनंदना । तुवां मारिलें रावणा । राज्यीं स्थापिलें बिभीषणा । जानकी घेवोनि आलासी ॥३४॥ तुवां देवकार्य सिद्धीस नेलें । अवतारचरित्र प्रकटिलें । तुझिये कीर्तीनें भरलें । भूमंडळ उचंबळत ॥३५॥ विजयो हो तुझ्या भुजांसी । विजयी झालासी सूर्यवंशीं । वैदेहवीरा आतां दे आज्ञेसी । निजदेशाशी जावया ॥३६॥ इतुकें ऐकोनि रायांचें वचन । बरवें म्हणोनि श्रीरघुनंदन । पुनरपि नृपांतें पूजोन । वस्त्राभरणें दिधलीं ॥३७॥ हस्ती घोडे रथ संपत्ती । पृथक् पृथक् देवोनि रायांप्रती । बोळविता झाला तयांप्रती । आदरें अति करोनी ॥३८॥ ऐसा तो श्रीरामचंद्र । पुढे काय करिता झाला नरेंद्र । नृप बोलावून गुणसमुद्र । तें सावध श्रोतीं परिसावें ॥३९॥ आधींच रम्य रामायण । त्यावरी श्रीरामचरित्र गहन । परिसतां भवबंधखंडन । पुण्य पावन पैं करी ॥४०॥ एका जनार्दनी विनती । विनवीतसें संतांप्रती । मी नेणें संस्कृतव्युत्पत्ती । कथासंगतिवांचोनी ॥४१॥ जेंवीं अंध अंधारीं जाय । तयासी न कळे मार्गाची सोय । तैसी मा तुम्हांमाजी पाहें । तुमचे सोयी चालतों ॥४२॥ अबद्ध सुबद्ध रामायण । भवरोगासि करी छेदन । जेंवी पुरिला हुताशन[3] । नाना वनें पैं जाळी ॥४३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां रामनृपदर्शनोत्सवो नाम अष्टत्रिंशोऽध्यायः ॥३८॥ ओंव्या ॥४३॥

---

शब्दार्थ – १. वरुणानदीतीरी, २. राक्षसविरहित, ३. अग्नी.

# अध्याय एकूणचाळिसावा

॥ श्रीरघुनाथाय नमः ॥

## वानर-राक्षसांना आनंद

श्रीराम सच्चिदानंदघन । लीलावतार परम पावन । खेळ खेळे विचित्र विंदान । विधात्या महिमान न कळे ज्याचें ॥१॥ ऐसा तो रघुपती । भद्रासनीं[1] अयोध्येप्रती । बैसला जैसा नक्षत्रें भोंवतीं । मध्यें चंद्र विराजे ॥२॥ भोंवते राजे तपोधन । तेणें सभा प्रसन्नवदन । बंदीजन करिती गुणवर्णन । गंधर्व गायन करिताती ॥३॥ तदनंतर पूर्वी भरतें । राजे बोलाविले होते रणसाह्यार्थे । ते विनविते झाले रघुपतीतें । स्वदेशातें जावया ॥४॥ श्रीराम म्हणे रायांसी । तुम्हांसि भरतें रणसाह्यासी । पाचारिलें परी तुमच्या प्रसादेंसी । आधींच रावण मारिला ॥५॥ तरी आतां स्वदेशा जावें । मज मनीं आठवावें । म्हणोनि प्रीतिपूर्वक गौरवें । राजयांची पूजा केली ॥६॥ ऐशी करोनियां पूजा । नृपां श्रीराम बोले वोजा[2] । तरी आतां शीघ्र स्वदेशा जा । आनंदनिर्भर होवोनी ॥७॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । समस्तीं राजीं मिळोन । श्रीरघुपतीस करोनि वाम प्रदक्षिण । स्वराष्ट्रातें निघाले ॥८॥ मार्गी करिती अनुवादातें । म्हणती व्यर्थ बोलाविलें भरतें । पूर्वी कार्य केलें श्रीरघुनाथें । मग अयोध्येतें आम्ही गेलों ॥९॥ भरत आम्ही सहपरिवारीं । पुढे जावें लंकेवरी । तंव श्रीराम-लक्ष्मण मारोनि वैरी । अयोध्येभीतरीं पैं आले ॥१०॥ आमुचें आगमन वृथा झालें । परी रघुनाथें आम्हां सन्मानिलें । ऐसे म्हणत म्हणतां पावले । आपुल्याला नगरांतें ॥११॥ तंव येरीकडे भरतलक्ष्मण । रायां बोळवोनि स्वस्थानीं जाण । मग प्रवेशते झाले अयोध्याभवन । बहुविध धन आणोनी ॥१२॥

भरत-लक्ष्मणानी आणलेले धन रामांनी वानर-राक्षसांना वाटून त्यांना संतुष्ट केले : रायीं श्रीरामाकारणें । पाठविलीं नानापरींचीं भूषणें । अश्व रथ गज गोधनें । नाना उष्ट्रें पाठविलीं ॥१३॥ शेळियांचें उदंड कळप । नाना व्याघ्र हरिणें सर्प । नाना जातींचे पक्षी अमूप । श्रीराम सुखरूप व्हावया ॥१४॥ चंदन पारिजात केशरपरिमळ । नानापरींचीं परिमळें बहळ । दिव्य वस्त्रें सुपरिमळ । श्रीरामासी दिधलीं ॥१५॥ ऐसें रायाचें बळिदान[3] । घेवोनि आले भरत लक्ष्मण । प्रवेशले अयोध्याभवन । जेथें परब्रह्म आपण असे ॥१६॥ श्रीरामा जाणविली मात । स्वामी आले लक्ष्मणभरत । राजयांचे भेटींसहित । तुमच्या दर्शना येताती ॥१७॥ इतुकें बोलता ते समयीं । रत्नाभरणेंसीं ते सभाठायीं । आले दोघे बंधु पाहीं । श्रीरामासी भेटले ॥१८॥ श्रीरामें देवोनि आलिंगन । पुढे ठेविलें राजयांचें धन । तें श्रीरामें समस्त देखोन । वांटिता झाला ते समयीं ॥१९॥ सुग्रीवादि करोनि वानर । बिभीषणासहित निशाचर । श्रीरामें केले अभर[4] । रत्नालंकार देवोनी ॥२०॥ दिधलीं समस्तां ऋक्षांप्रती[5] । संतुष्ट केल्या वानरपंक्तीं । एकीं आभरणें बांधोनि हातीं । एकीं गळां बांधिलीं ॥२१॥ एक मस्तकीं हिरे खोंविती । एक करीं मुद्रा घालिती । एक ते दिव्याभरणें वेढिती । एक गाती नाचती श्रीरामापुढें ॥२२॥ एक श्रीरामापुढें पिलंगती[6] । एक श्रीरामा वांकुल्या दाविती । एक ते कुसी खांजविती । दांत विचकिती श्रीरामापुढें ॥२३॥ ऐसें संतुष्ट ऋक्ष वानर । श्रीरामापुढें करिती गजर । तें देखोनि श्रीरामचंद्र । आनंदें थोर डुलतसे ॥२४॥ एकें परिमळद्रव्य घेवोनि हातीं । एकमेकांतें लाविती । भोक्ता श्रीराम एक म्हणती । ग्रासोग्रासीं वानर ॥२५॥ ऐसे एक मासपर्यंत ।

---

शब्दार्थ - १. सिंहासनी, २. प्रेमाने, ३. कर देणे, ४. संपन्न, ५. अस्वलांस, ६. मुरडती.

सुखें वसते झाले अयोध्येआंत । युग घटिकेसमान जात । श्रीरघुनाथासन्निध ॥२६॥ ऐसा क्रमला प्रथम मास । दुसरा मास प्रवर्तला वानरांस । दिवसेंदिवस अति उल्हास । श्रीरामभक्तांस जातसे ॥२७॥ हृष्ट पुष्ट ऋक्ष वानर । आणि बिभीषणाचे रजनीचर । मागील विसरले गृह पुत्र दार । श्रीरघुवीर सेवितां ॥२८॥ एका जनार्दना शरण । वानरेंशीं श्रीरघुनंदन । अयोध्येसीं सुखसंपन्न । विराजमान पैं असे ॥२९॥ पुढील कथा अति रसाळ जाण । वानरां-राक्षसां-लागून । आज्ञा देईल रघुनंदन । स्वभवना जावया ॥३०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां वानरराक्षससुखसंपन्नतानाम एकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥३९॥ ओंव्या ॥३०॥

## अध्याय चाळिसावा

॥ श्रीराधाकृष्णाय नमः ॥

### वानरांचे स्वदेशी गमन

रामंकडून सुग्रीवाची प्रशंसा व त्याची पाठवणी : तदनंतर ऋक्ष वानर-राक्षस । अयोध्येसीं आनंदें बहुवस । क्रमिला तेथें एक मास । सुखउल्हास सर्वांसी ॥१॥ वानररावो जो भूपती । तयाप्रति बोले श्रीरघुपती । तुझे उपकार आठवितां चित्तीं । थोर सुख होतसे ॥२॥ तुझेनि संगें वानर । मिळाले गा अपरंपार । तुझेनि मज सीता सुंदर । प्राप्त झाली किष्किंधेशा[1] ॥३॥ तरी आतां आपुले नगरासी । वेगीं जावें किष्किंधेसी । जे कां अटक[2] देवां दैत्यांसी । काळाचें तिसी न चले कांहीं ॥४॥ ऐसिया किष्किंधेप्रती । राज्य करीं गा वानरपती । पाळीं प्रधान सेना संपत्ती । निष्कंटक राज्य करीं ॥५॥

सुग्रीवाला उपदेश : महाबाहो किष्किंधानाथा । परम प्रीतीने पाहें तारासुता । जैसा पिता तैसा चुलता । पुत्रत्वें पाळीं तयातें ॥६॥ अगंद वीर धीर परम शूर । सज्ञान ज्ञाता विवेकी चतुर । त्यावरी कृपा करीं अपार । हा गुणसागर अंगद ॥७॥ हनुमंतातें परम प्रीतीं । तूं प्रधानत्वें पाहीं गा नृपती । जयाची वानितां गुणकीर्ती । दुसरा क्षितीं ऐसा नाहीं ॥८॥ मारुतीची मारुतीस उपमा । आन नाहीं गा वानरोत्तमा । याकारणें वर्णावया आम्हां । उत्कंठा होत नाहीं ॥९॥ सुषेण तुझा श्वशुर । तारेचा पिता महाशूर । आणीक तार वानर । परमधीर संग्रामीं ॥१०॥ कुमुद महादुर्धर्ष । नीळ वानर रणकर्कश । शतबळीनामा शूर बहुवस । नामेंच त्रास परवीरां ॥११॥ मैंद द्विविद गंधमादन । गज गवाक्ष गवय शरभ जाण । हेमकूट तपन ध्वज वैद्य सुषेण । प्रतपन केसरी तरु तराळ ॥१२॥ नळ जो शिळातारक । विश्वकर्मा जयाचा जनक । सेतुकार्या निपुण अधिक । राक्षसां धाक बहु त्याचा ॥१३॥ जांबवंतादि ऋक्षगण । मजकारणें कष्टले दारुण । मजलागीं इहीं त्यजिला प्राण । प्रिया पुत्र धन सांडोनी ॥१४॥ या समस्तातें पाळीं प्रीति करून । अन्यथा न करीं माझें वचन । माझें स्वरूप सनातन । तेथें मन ठेवोनी ॥१५॥ माझे स्वरूपीं ठेवोनि मनासी । राज्य करीं सुखसंतोषीं । ऐसें आज्ञापोनि सुग्रीवासी । परम प्रीतीसी करोनी ॥१६॥

सुग्रीवाची प्रशंसा व त्याला श्रीरामांचा निरोप : तदनंतर श्रीरघुपती । बिभीषणेंसीं अति युक्तीं । मधुराक्षरीं अक्षरपंक्ती । बोलता झाला श्रीराम ॥१७॥ कीं चकोराचें देखोनि आर्त[3] । हृदयीं

---

शब्दार्थ - १. सुग्रीवा, २. प्रतिबंध, ३. उत्सुकता.

जाणोनि अति क्षुधित । तयासि इंदु[1] सुधा[2] देत । तैसा श्रीरघुनाथ बोलता झाला ॥१८॥ श्रीराम म्हणे बिभीषणा । तूं आमुचा बंधु सुहृद[3] प्राणा । तुझे उपकार वर्णावया मज रघुनंदना । वाचे वळण पडतसे ॥१९॥ अगा धर्मज्ञा लंकापती । राक्षसकुळीं तूं धर्ममूर्ती । आत्तां शीघ्र स्वपुरीप्रती । जाई जियेप्रती परिघ[4] सागरू ॥२०॥ पूर्वी कुबेरापासून । हरिलें लंकाभवन । बंधूसि देवोनि अपमान । अनुचित दारुण रावणें केलें ॥२१॥ जरी स्वधर्मे राज्य करिता । सर्वभूतीं दया समता । तयाच्या राज्या क्षयो कल्पांता । न येता तत्वता निर्धारें ॥२२॥ जनकादिका केवळ मुक्त । असोनि प्रपंचीं वर्तत । जगत् ब्रह्मस्वरूप देखत । मुळींचें अन्वयेंकरोनी ॥२३॥ तरी तूं बिभीषणा अवधारीं । तूं राज्य ब्रह्मत्वें करीं । अधर्माचा लेश पुरी-। माजि प्रवेशों न द्यावा ॥२४॥ बंधु ज्येष्ट तुझा कुबेर । तयाचा करावा आदर । आणीक वृद्ध थोर थोर । ते ब्रह्मदृष्टीं पहावे ॥२५॥ मज तुम्ही दोघे जण । परम प्रीतिमात्र पढियंते पूर्ण । तुमचें मी अहर्निशीं स्मरण । मनामाजीं करीतसें ॥२६॥ आतां तुम्हीं दोघे जण । स्वसैन्येंसीं करावें गमन । सांडा हृदयीचें दुःख दारुण । परमानंदें पूर्ण पैं जावें ॥२७॥ ऐकोनि श्रीरघुनाथाचें वचन । ऋक्ष वानर राक्षसगण । म्हणते झाले धन्य धन्य । सूर्यवंशाभरण[5] श्रीराम ॥२८॥ समस्त म्हणती रावणारी । तुझिया वचनामृताची तरी । भरली आमुच्या हृदयसागरीं । मर्यादेवेगळी मिसळली ॥२९॥ तुझें वचन ब्रह्मलिखित । तूं विधात्याचा विधाता निश्चित । तूं ब्रह्म सदोदित । श्रुतीतें[6] अंत न कळे तुझा ॥३०॥

मारुतीची प्रार्थना : तदनंतर मारुती । स्वामीप्रति करी विनंती । म्हणे प्रसन्न झालेती रघुपती । तरी मी एक मागतसें ॥३१॥ तुझी कृपा मजवरी । जरी आहे गा रावणारी । तरी तुझी भक्ति मम हृदयाभीतरीं । चिरकाळ राहो दातारा ॥३२॥ जंववरी तुझें चरित्र । भूमंडळीं राहे निश्चित । तंववरी माझ्या शरीरांत । प्राण राहो दातारा ॥३३॥ तुझें कथेची आर्ती[7] । अखंड राहो माझ्या चित्तीं । आणीक मी न मागें रघुपती । इतुकें देईं दातारा ॥३४॥ ऐकोनि हनुमंतमुखींची गोष्टी। श्रीरामासि आनंद पोटीं । धांवोनि खेंवा[8] दिधली मिठी । पाठी थापटी श्रीराम ॥३५॥

रामांचे वरदान : श्रीराम म्हणे गा मारुती । संतोषलों तुझिये भक्ती । जे जे अपेक्षा तुझे चित्तीं । ते ते त्रिशुद्धी[9] पावसी ॥३६॥ लोकालोक जंवपर्यंत । जंवपर्यंत माझे चरित्र । जोंपर्यंत जन स्वधर्मी रत । तंवपर्यंत कथा असे ॥३७॥ माझी कथा हे भूमंडळीं । तंववरी तुझे हृदय-स्थळीं । असतील जंव अंतराळीं । शशी सूर्य भ्रमण करित ॥३८॥ दिव्य रत्नांचा हार । चंद्रासारिखा मनोहर । श्रीरामें काढोनि सत्वर । हनुम्याकंठीं घातला ॥३९॥

रामांचा निरोप घेऊन जड अंतःकरणाने सर्वजण निघाले : हनुमान लागला पायीं । सर्वेचि आलिंगिली दोहीं बाहीं । श्रीरामप्रदक्षिणा करोनि वज्रदेही । निजस्थळासी निघाला ॥४०॥ सुग्रीवें करोनि प्रदक्षिण । अंगदासहित वंदोनि चरण । निघते झाले स्वराज्या जाण । आज्ञा घेवोन रामाची ॥४१॥ बिभीषणेंही तैसेच परी । नमस्कारिला निजबंधूचा अरी । समस्तां अश्रु आले ते अवसरीं । सद्गदित कंठ पैं झाले ॥४२॥ जैसें मूर्खाचें भ्रमे चित्त । भ्रांत होय न स्मरे हित । तैसे श्रीरामवियोगें अति दुःखित । आपुलाले दिशे चालले ॥४३॥ जैसा कृपणाचा जाय ठेवा। आणि भ्रांति उपजे त्याच्या जीवा । तैसें समस्तां झालें तेव्हां । श्रीरामाच्या वियोगें ॥४४॥ श्रीरामसन्निधानेंकरून । पावन झाले ऋक्षवानरगण । बिभीषणादि राक्षस

शब्दार्थ - १. चंद्र, २. अमृत, ३. मित्र, ४. वेढा, ५. सूर्यवंशाला भूषणभूत, ६. वेदांना, ७. आवड, ८. आलिंगन, ९. खरोखर.

जाण । झाले पावन तिहीं लोकीं ॥४५॥ एका जनार्दना शरण । वानरीं स्वदेशा केलें गमन । मागें श्रीरामें सभा विसर्जून । केलें माध्यान्हभोजन ॥४६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां समस्तवानरादिस्वदेशगमनं नाम चत्वारिंशोऽध्याय: ॥४०॥ ओंव्या ॥४६॥

## अध्याय एक्केचाळिसावा

॥ श्रीअवनिजापतये नम: ॥

भरतकृत श्रीरामस्तुती

गेले ऋक्ष राक्षस वानर । मागें बंधूंसहित श्रीरघुवीर । बैसले असती सुखें अपार । आनंदें निर्भर ते समयीं ॥१॥ तेव्हां माध्यान्हकाळ प्रवर्तला । स्नानसंध्या विधी सर्व केला । भोजन सारोनि ऋषि सकळां । बंधूंसहित राघवें ॥२॥ तंव अकस्मात मधुर वाणी । आकाशींहूनि श्रीरामश्रवणीं । पडली तये सभास्थानी । पाहें गगनीं मज श्रीरामा ॥३॥

कुबेराचे पुष्पक विमान पुन: श्रीरामांजवळ त्यांच्या सेवेसाठी आले : कृपेंकरोनि राघवा । मज पाहें कृपार्णवा[1] । मी पुष्पक कैलासाहूनि देवा । धनेशें मज पाठविलें ॥४॥ बोलिलें मंजुळ उत्तरें । तें अवधारावें राजीवनेत्रें । म्हणे पुष्पकावरी श्रीरामचंद्रें । पूर्वी आरोहण पैं केलें ॥५॥ मी तुझे आज्ञेनें रघुपती । गेलों होतो धनेशाप्रती । तेणें मज पुनरपि नरपती । तुझे सेवेसी पाठविलें ॥६॥ ज्यावरी आरूढला श्रीरघुनाथ । तें पूज्य मज पूजित । मी त्यावरी न आरूढें निश्चित । हा संकल्प कृत पैं माझा ॥७॥ अगा पुष्पका अवधारीं । श्रीरामें मारिलें दुराचारी । रावण वधिला सहपरिवारीं । जो कां करी निंद्य कर्म ॥८॥ मज झालें परम सुख । त्रैलोक्यासि अति हरिख । दुरात्मा वधून दशमुख । प्रधानेंसीं देख रणांगणीं ॥९॥ अगा पुष्पका रघुनाथातें । तुवां वहावें माझें आज्ञेतें । ऐसें निरोपोनि धनेशें येथें । तुमचें सेवेतें पाठविलें ॥१०॥

रामांनी स्वीकार करून त्याची पूजा केली : ऐकोनि श्रीरामें त्याची मात । मनीं संतोषला जनकजामात । बरवें म्हणोनि अंगीकारित । कुबेराच्या विमाना ॥११॥ तदनंतरें श्रीरघुपती । पुष्पका पूजी अत्ति निगुतीं । धूप दीप पंचारती । नाना सुगंधीं पूजिलें ॥१२॥ पुष्पका म्हणे श्रीराम । तूं अदृश्यगतीं विचरें[2] व्योम । जैसे सिद्ध साधु भक्त परम । अदृश्यगती विचरती ॥१३॥ तैशी तुवां पुष्पकेंही । स्वइच्छेनें विचरावी[3] मही । मी स्मरण करीन जे काळीं पाहीं । तेव्हा त्वरित पैं यावें ॥१४॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । पुष्पकें करोनि प्रदक्षिण । श्रीरामा माथा लावून । सुखें गमन करितें झालें ॥१५॥ ऐसें पुष्पक विमान । कोणा दु:ख नेदितां गगन । विचरे पुरें पाटणें आणि उद्यान । अदृश्य होवोन ते काळीं ॥१६॥

सर्वत्र सुखसमृद्धी पाहून भरताचे आश्चर्य : तंव येरीकडे कैकेयीसुत । जितजामदग्न्या[4] विनवीत । स्वामी आश्चर्य थोर येथ । देखतसें राजेंद्रा ॥१७॥ श्रीरामराज्यमहिमान । कोणा नाहीं दु:ख दैन्य । कोणा नाहीं मीतूंपण । सुखसंपन्न पुरवासीं ॥१८॥ कोणा नाहीं जरेची वार्ता । कोणा नाहीं हृदयीं चिंता । कोणा नाहीं देहीं कृशता । स्वानंदता पुरवासी ॥१९॥ मृत्यूचें भय नाहीं कोणासी । राम राज्य करितां जनासी । सुखी स्वानंदें पुरवासी । अहर्निशीं रामभजन ॥२०॥ राज्यीं असतां सीताकांत । सर्व जन सुखी स्वस्थ । राज्य करिती आनंदभरित ।

शब्दार्थ – १. कृपासमुद्रा, २. फिरे, चाल, ३. फिरावे, ४. रामाला.

पूर्ण मनोरथ सर्वांचे ॥२१॥ श्रीरामाज्ञेकरून । मृत्यु भक्तांचे वंदी चरण । अयोध्यावासी स्वधर्माचरण । नित्यमेव करिताती ॥२२॥ बाळत्व तारुण्य जरा । न बाधी श्रीरामाच्या किंकरा । सर्वा सुख देतसे वारा । सर्वांतरीं राहून ॥२३॥ यथाकाळीं पर्जन्य । वर्षाव करी श्रीरामाज्ञेकरून । तेणें पिकती नाना धान्य । सुकाळ पूर्ण अयोध्येसीं ॥२४॥ जे जे काळीं जो जो ऋतु । तो तो यथाकाळीं प्रवर्ततु । सूर्य खडतर नाहीं तपतु । श्रीरामाज्ञेकरोनी ॥२५॥ समुद्र नुल्लंघीच मर्यादा । साधु न प्रवर्तती निंद्य वादा । वेदशास्त्रांच्या संवादा । अन्यथा भाषण न करिती ॥२६॥ घरोघरीं वेदाध्ययन । पुराण आणि हरिकीर्तन । अखंड वाचे नाम-स्मरण । कोणा विस्मरण पैं नाहीं ॥२७॥

रामनाममहिमा : ऐसा श्रीराम सच्चिदानंदघन । जो कां योगीश्वरांचे हृदयरत्न । जो कां भक्तजननिजजीवन[1] । तो स्वानंदे पूर्ण लीला दावी ॥२८॥ जो चिदाकाशींचें गगन । जो भक्तजनवनींचा चंदन । जो कां आर्तचकोरां निजजीवन । तो स्वानंदें पूर्ण लीला दावी ॥२९॥ जो भक्तसागरींची नौका । जो योग्यां हृदयीं चित्कालिका । तो श्रीराम अकिंचनसखा[2] । ज्याचे नामें देखा पातकें हरती ॥३०॥ एकचि एक जयाचें नाम । महादोषां करी भस्म । कलियुगीं साधनांचें नाहीं काम । रामनामावांचोनी ॥३१॥ कलियुगीं मुख्य साधन । श्रीरामाचें नाम जाण । पार्वतीप्रति मदनारी आपण । नाममहिमान सांगतसे ॥३२॥ नामें भुक्ति नामें मुक्ती । नामें यश नामें कीर्ती । नामें होय परमपदप्राप्ती । नामें हरती महादोष ॥३३॥ अबद्ध[3] करितां वेदपठण । अवश्य निषेध बाधी जाण । अबद्ध म्हणतां श्रीराम नारायण । अगणित पुण्य स्मर्त्यातें ॥३४॥ अबद्ध मंत्र उच्चारिती । जापक चळती नेणों किती । अबद्ध नाम नित्य जपती । ते पावती सायुज्य ॥३५॥ नामें कळिकाळा सीक[4] । नामें पातकां महाधाक । नामें यमादिकां हाक । नामें प्राप्त सायुज्य ॥३६॥ नामें उद्धरिली कुट्टिनी । नामें गणिका चढली विमानीं । नामें पावन हे अवनी । नामें त्रिभुवनीं आनंद ॥३७॥ नामें वाल्मीक चोरटा । कळिकाळें घेत झटा । नामें मुक्तीच्या पिकल्या पेंठा । नामें देशवटा भवदोषां ॥३८॥

गोकोटिदानं ग्रहणेषु काशीप्रयागगंगायुतकल्पवासः ।
यज्ञायुतं मेरुसुवर्णदानं गोविन्दनामस्मरणेन तुल्यम् ॥१॥

गोविंदनामाच्या तुळणेंसीं । न येती पुण्याचिया राशी । ग्रहणकाळीं कोटिधेनूंसी । जरी दिधलिया शृंगारून ॥३९॥ सुवर्णशृंगी रौप्यखुरीं । सवत्सा आभरणेंसीं कोटिवरी । दिधल्या फळ नामाबरोबरी । न ये निर्धारीं तुळितांही ॥४०॥ अथवा दश सहस्र वर्षेपर्यंत । त्रिवेणीतीर आश्रयोनि तेथ । राहिल्या पुण्य अगणित । नामतुळणेसीं पैं नये ॥४१॥ एक अयुत महायज्ञ । सांगोपांग करोनि जाण । अथवा मेरूइतकें सुवर्णदान । दिधल्या नाममहिमान अधिक ॥४२॥ इतुकीं पुण्यें एकीकडे । घालितां नामाच्या पारडे । तुळणेसी न पावे चंद्रचूडें । म्हणोनि हृदयीं धरियेलें ॥४३॥ आधींच तो पिनाकपाणी । सकळ देवांचा मुकुट-मणी । तोही राहिला नामसंजीवनीं । उपासक होवोनी नामाचा ॥४४॥ ऐसी भरतें स्तुति करून । ऐकोनि श्रीराम दे आलिंगन । देवोनि दोघां समाधान । वेगळेपण दिसेना ॥४५॥ अग्रजानुजां खेंवा पडली मिठी । जेंवी गगना गगनीं होय भेटी । ऐसी आलिंगनसुखसंतुष्टी ।

---

शब्दार्थ – १. भक्तांचें आश्रयस्थान, २. निर्धनांचा मित्र, ३. अव्यवस्थित, कसेंतरी, ४. शिक्षा.

येरयेरां पैं झाली ॥४६॥ रवि सोम मासाअंती । सम[1] मंडळा जेंवी येती । तेंवी मांडवीकांत[2] आणि जानकीपती । समसाम्य भेटले ॥४७॥ एका जनार्दना शरण । चवघे बंधु जानकीरमण । करित झाला चरित्रकथन । तें सावधान अवधारा ॥४८॥ मागील कथेची संगती । राजे बोळवोनि श्रीरघुपती । पुष्पक पूजोनि अति निगुतीं । तें विचरावया क्षितीं[3] पाठविलें ॥४९॥ तदुपरी भरताचे स्तवन । ऐकोनि श्रीराम सुखसंपन्न । भरत भक्तराज म्हणोन । आलिंगन देवोन सुखी केला ॥५०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां भरतस्तवनं नाम एकचत्वारिंशोऽध्याय: ॥४१॥ ओंव्या ॥५०॥ श्लोक ॥१॥ एवं ॥५१॥

## अध्याय बेचाळिसावा

॥ श्रीरघुवीराय नम: ॥

अशोकवाटिकेचे वर्णन

गतकथा झाली ऐसी । जे राजे जावोनि स्वदेशासी । मार्गे श्रीराम बंधूसहपरिवारेंसीं । राज्य करित अयोध्ये ॥१॥ भरतें करोनियां स्तवन । संतोषला रघुनंदन । देवोनि क्षेम आलिंगन । दोघे सुखसंपन्न पैं असती ॥२॥ तयाउपरी जनकजामात । जानकीसहित सुखें वर्तत । इच्छा उपजली वनवाटिकेंत । सीतायुक्त क्रीडा करणें ॥३॥ धरणिजेसहवर्तमान[4] । राजीवनेत्र श्रीरघुनंदन । तयाचें करावया वर्णन । मी अपुरतें दीन काय वर्णूं ॥४॥

अशोकवनाचे वर्णन : अत्यंत सुंदर तें वन । क्रीडा करावया वाटिके जाण । सेवकांसहित श्रीरघुनंदन । येता झाला वनातें ॥५॥ तया वनीं वृक्ष जाती । नानापरींच्या अनुपम्य[5] असती । तितुक्या सांगतां विस्ताराप्रती । कथा निगुतीं जाईल ॥६॥ तरी सांगों संकळित[6] । जे श्रोतयां संतोष होत । आणि पुढारां चालेल ग्रंथ । श्रीरघुनाथगुणांनीं ॥७॥ चंदन अगर धूप वृक्ष । देवदारू पाटल पलाश । चंपक नागकेशर लक्षानुलक्ष । मधूक फणस अपार ॥८॥ पारिजातक मघमघीत । भ्रमर तेथें सुवास घेत । अर्जुनसादडे अगणित । सप्तपर्ण वृक्ष असंख्य ॥९॥ मांदारकर्दळींची दाटी । इंगुदी कदंब कोट्यनुकोटी । जांबुळी दाळिंबियांच्या थाटी[7] । मार्ग दृष्टी लक्षेना ॥१०॥ कोविदार वट पिंपळ । निंबें नारिंगें नारिकेळ । जंबीर कविंठ बेलपरिमळ । औदुंबर स्थूळ गगनचुंबित ॥११॥ भोंकरी करवंदी रायआवळी । चौरें बोरें टेंबरें कायफळी । लगडी लिंबोरें नाना वळी । परिमळ अत्यंत ॥१२॥ आम्रवृक्ष अति घनदाट । वरी पक्षियांचें बैसले थाट । हंस कोकिळा शुक्र सरळ पाठ । श्रीरामनामें आलापिती ॥१३॥ आतां सांगों पुष्पयाती । मालती मोगरे शेवंती । जाई जुई परिमळें घुमती । श्रीरघुपतिसुखार्थ ॥१४॥ वापी[8] कारंजीं पोखरणी[9] । माजी भरलें निर्मळ पाणी । तयांचे पायऱ्यां नवरत्न-मणी । ठायीं ठायीं जडियेले ॥१५॥ माजी कमळिणी चतुर्विधा । अंजनी आरक्त पीत सुधा । भ्रमर रुणझुणिती नादा । दश दिशा व्यापिलिया ॥१६॥ भ्रमर ते रामभक्त । पुष्पें सुवासरूपें अच्युत । तेथें लोभलें होवोनि विरक्त । देहभावातें नाठविती ॥१७॥ तंव येरीकडे रवि अस्तमानीं । जातां पुष्पें जातीं मिळोनी । माजी भ्रमर गुंतोनी । मेला म्हणती मूर्खत्वें ॥१८॥ तया सरोवराचे तीरीं । हंस बक मारसें कुक्कुट नानापरी । चक्रवाकें सहित नारी । जळक्रीडा करिताती ॥१९॥ तया वाटिकेसीं चौफेर । दुर्गदारवंटे दुर्धर । काळासही तेथें सत्वर । प्रवेश नाहीं जावया

---

शब्दार्थ – १. एकाच, २. भरत, ३. पृथ्वीवर, ४. सीतेसह, ५. निरुपम, ६. संक्षेपानें, ७. समूह, ८. विहिरी, ९. तळीं.

॥२०॥ ठायीं ठायीं नवरत्नांचें । बुरूज केले श्रीमंतें कनकाचे । तयांच्या प्रभे रविसोमांचें । तेज कोणीकडे कळेना ॥२१॥ पुष्पतरूंसीं झगडतां पवन । तळीं पुष्पें पडती तेण । शोभायमान जेंवी नक्षत्रीं गगन । अत्यंत साजिरे पैं दिसे ॥२२॥ अमरावतीसी नंदनवन । तें सरी न पावे यासीं जाण । वैश्रवणाचें[1] चैत्रवन । लज्जायमान यापुढें ॥२३॥ ऐसें वन शोभायमान । तें पाहता झाला जानकीजीवन । अशोकवृक्ष मर्यादेवीण जाण । त्या वनीं गगनचुंबित ॥२४॥ अशोक जेथें बहुत असती । तया अशोकवाटिका म्हणती । तेथें प्रवेशला श्रीरघुपती । वनक्रीडेकारणें ॥२५॥ वना येतो श्रीरघुनंदन । म्हणोनि वनपाळीं सज्जिलें पूर्ण । कुशासनें व्याघ्रांबरें कृष्णाजिनें । नानापरींचीं साजिरीं ।२६॥ जानकीचा धरोनि हात । श्रीराम रसप्राशन करवित । आपणही घेवोनि त्वरित । स्वानंदें डुल्लत पैं असे ॥२७॥ नवल त्या रसाचें महिमान । इतर रस त्यापुढें तृण । ऐसा ब्रह्मानंद रस सेवून । डुल्लतीं झालीं पैं दोघें ॥२८॥ शचीसहित सुरपती[2] । अमृतप्राशना जेंवी बैसती । तेंवी जाण तो रघुपती । जानकीसहित रस प्याला ॥२९॥ नानापरींची मधुर फळें । सेविलीं जानकीसहित घननीळें । सुखस्वानंदें तये वेळे । वरासनीं दोघें बैसलीं ॥३०॥ नगरवासी पुत्रदारांसहित । तेही मद्य घेवोनि झाले उन्मत्त । पुढें गंधर्व येवोनि गीत नृत्य । श्रीरामसुखार्थ पैं करिती ॥३१॥ जानकीसहित रघुनंदन । रमत असतां सुखसंपन्न । दहा सहस्र वर्षे क्रमिलीं जाण । पुढील कथन अवधारा ॥३२॥

जानकी गर्भवती झालेली पाहून श्रीरामांना हर्ष : जानकीउदरीं गर्भचिन्ह । तेणें वपु[3] झाली शुभ्रवर्ण । तें देखोनि रघुनंदन । अति उल्हाससंपन्न पैं जाहला ॥३३॥ पुत्रकामाची चिंता होती । तंव भार्या देखिली गर्भवती । शास्त्राज्ञेनें श्रीरघुपती । जानकीस पुसता झाला ॥३४॥ आधींच सुंदर वेल्हाळ । गर्भें टवटवीत मुखकमळ । ऐसें देखोनि घननीळ । जानकीसी बोलतसे ॥३५॥ चापशरपाणि पुसे सीतेतें । काय आवडी आवडे तूतें । ते माग वो रुचे तें । आणोनि तुजला तें देईन ॥३६॥ हांसोनि म्हणे जनकात्मजा । अहो जी स्वामी गरुडध्वजा । तुझिये प्रसादें श्रीरघुराजा । कांहीं वासना नुरलीसे ॥३७॥ तुमचेनि प्रसादें श्रीरघुपती । म्यां भोगिली सर्व संपत्तीं । कांहीं इच्छा माझे चित्तीं । मागावयाची पैं नाहीं ॥३७॥ कल्पवृक्ष जयाचे मंदिरीं । कामधेनूंचीं खिल्लारें जया घरीं । त्या नरा कोणे पदार्थाची उरी । उरली असेल राजेंद्रा ॥३९॥ चिंतामणि अंगणींचे खडे । परीस जयाचे घरीं लोळत पडे । तया नरा कोण सांकडें । काय मागण्याचें उरलेंसे ॥४०॥

तपोवनांत ऋषींच्या सहवासांत राहण्याचे सीतेला डोहाळे : परी वर्ते जीवीं एक वीरचूडामणी । जे तपोवनें पुण्यस्थानीं । पहावीं ऐसी इच्छा मनीं । वर्ततसे राजेंद्रा ॥४१॥ उभय जें गंगातीर । आश्रयोनि राहिले ऋषीश्वर । तयांचे सन्निध फळमूळाहार । करोनियां वसावें ॥४२॥ ऐसें थोडेच दिवसवरी । वसावें जी मुनिशेजारीं । हेंचि मागणें श्रीहरी । कृपा करोनि सिद्धि न्यावें ॥४३॥ ऐकोनि जानकीचें वचन । खुणेसि पावला श्रीरघुनंदन । म्हणे शीघ्र काळें मनोरथ पूर्ण । आत्माराम पुरवील ॥४४॥ इतुकें बोलोनि श्रीरघुपती । शब्दें बुझाविली[4] सीता सती । मग गृहा येवोनि सभेप्रती । बंधूंसहित बैसला ॥४५॥ राज्य करितां श्रीरघुपती । असत्य नाहीं जनांप्रती । पुरवासी आपुले स्वधर्मस्थितीं । नगरीं वसती स्वानंदें ॥४६॥ यथाकाळीं पर्जन्य पडे । घरोघरीं गोधनांचे वाडे । घरोघरीं मुंजी वऱ्हाडें[5] । कुमरकुमरीचें जन करिती ॥४७॥

---

शब्दार्थ - १. कुबेराचें, २. इंद्र, ३. शरीर, ४. समजाविली, ५. लग्नविधी.

एका जनार्दना शरण । श्रीरामें गोड रामायण । पुढें सीते वनासी गमन । सावधान अवधारा ॥४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां अशोकवाटिकावर्णनं नाम द्विचत्वारिंशोऽध्याय: ॥४२॥ ओंव्या ॥४८॥

# अध्याय त्रेचाळिसावा

॥ श्रीदशरथात्मजाय नमः ॥

## श्रीराम-भद्र-संवाद

तत्रोपविष्टं राजानमुपासंते विचक्षणाः । कथयंतः कथा नानाहास्यकाराः समंततः ॥१॥
विजयो मधुमंतश्च कश्यपो मंगलाकुलः । पुराजित्कालियो भद्रो दंतवक्त्रः सुमागधः ॥२॥
एते कथा बहुविधाः परिहाससन्विताः ॥३॥

भद्रासनीं चापशरपाणी । तेथें बैसलें संत चतुर ज्ञानी । पंडित ऋषी महामुनी । श्रीरामातें उपासिती ॥१॥ नानापरींच्या कथा पुराणें । धर्मचर्चा हरिकीर्तनें । विनोद हास्य गीत गायनें । सकळ मिळोन तेथें करिती ॥२॥ कोण कोण ते सभेप्रती । श्रीरामसन्निध तेथें असती। तयांची नामें संकळितीं । यथानिगुतीं सांगेन ॥३॥ विजयो दुसरा मधुमंत । कश्यप मंगळ चौथा तेथ । पुराजित् काळियो दंतवक्त्र । भद्र जाण आठवा ॥४॥ नवमाचें सुमागध नाम । हे नवविध सभानायक परम । यांचा विश्वास मानी श्रीराम । अति चतुर म्हणोनी ॥५॥ हे इतुके श्रीरघुपति । आपुलेनि प्रताप सांगती । नानापरींचे विनोद करिती । धरणिजापतिसुखार्थ ॥६॥ ऐसें ऐकोनि तयांचें गीतगायन । विनोद उपहास नृत्य जाण । तयांप्रति बोले श्रीरघुनंदन । सावधान अवधारा ॥७॥

**रामांनी लोकांचे मतांविषयी भद्राला प्रश्न केला :** तयांमध्ये भद्र श्रेष्ठ । विवेकी ज्ञाता आत्मनिष्ठ । तयाप्रति रावणारी[1] प्रतापतेजिष्ठ । बोलता झाला ते समयीं ॥८॥ अगा भद्रा विचक्षणा । सभेंत योग्य अति शहाणा । युक्तिप्रयुक्तीं तूं विचक्षणा । तुझ्या गुणां तुळणा नाहीं ॥९॥ पुरवासी देशवासी जन । वसताती आपुले घरीं जाण । काय वदती श्रीरघुनंदन । नवा राजा अयोध्येचा ॥१०॥ कीं आणिकाही निंदा करिती । कीं भरता बोल ठेविती । कीं शत्रुघ्न सौमित्र यांची स्थिती । निंदा करिती देखोनी ॥११॥ कैकेयीमाता वनवासार्सी । आम्हां धाडिलें दंडकारण्यासीं । किंवा बोलती सीतेसी । रावणें हरिलें म्हणोनी ॥१२॥ नगरवासियांचें वर्तमान । भद्रा ऐकिलें असेल जाण । तें मजप्रति निवेदन । ये काळीं करावें तुवां ॥१३॥ श्रीरामाचें मुखपद्म जाण । ऐसें भद्रें ऐकोन । पुढती श्रीरामासी मधुर वचन । बोलता झाला ते समयीं ॥१४॥

**रामराज्याविषयी नागरिक प्रसन्न असल्याचे त्याने रामांना सांगितले :** म्हणे भास्करवंशभूषणा नरचूडामणी । लोक पुरीं पाटणीं[2] गृहीं वनीं । मार्गी चालतां वचनीं । सतवन करिती पैं तुझें ॥१५॥ श्रीराम धर्मिष्ठ राजा । आणि पतिव्रता जनकात्मजा । लक्ष्मणें वनवासीं अग्रजा । बहुत सुख दिधलें पैं ॥१६॥ वधिले रावणकुंभकर्ण । सेना सैन्यपुत्र प्रधान । राज्यीं स्थापोनि बिभीषण । बंधुसीतेसीं येथें आला ॥१७॥ अयोध्येसीं धर्मनीती । नवा राजा होवोनि रघुपती । प्रजापाळक परम प्रीतीं । विजयी व्हावा श्रीराम ॥१८॥

शब्दार्थ - १. रामचंद्र, २. शहरीं.

तरीही खरे असेल ते स्पष्ट सांगण्याचा रामांचा त्याला आग्रह : ऐसें भद्रें बोलिल्यावरही । पुनरपि श्रीराम प्रश्न करी । भद्रा बरवें वाईट या दोहींभीतरी । जन सूत्रीं बांधले ॥१९॥ सुख दुःख पुण्य पाप । ऐसें जनाचे संकल्प । सत्य असत्य हा खटाटोप । मी माझें देख सकळांसी ॥२०॥ मी श्रेष्ठ कुलवंत । येर ते अवघे अकुळवंत । मी ज्ञाता महापंडित । येर अज्ञान अपंडित जाणावे ॥२१॥ ऐसें त्रिगुणांचेनि पाशें । सकळहि जग बांधिलें असे । त्या अशुभ शुभ वार्ता पैं असे । गुणानुरूपें निघताती ॥२२॥ भद्रा नगरवासी जन । जे वदत असती तें आपण । यथानिगुतीं करीं निवेदन । शंका झणीं[1] धरसील ॥२३॥ आपणासि शुभ कर्तव्यता । हें भद्रा जाण तत्वता । अशुभ त्यागोनि उत्तमार्था । म्यां श्रीरघुनाथा आचरावें ॥२४॥ ऐसी सीतापति बोलोनि सरे । तदनंतरें भद्रें वीरें । नगरीचा वृत्तांत सत्वरें । श्रीरामासी सांगितला ॥२५॥

भद्राने सीतेच्या चारित्र्याविषयी लोक साशंक असल्याचे सांगितले : अहो जी दयानिधि रावणारी । पुरीं पाटणीं नगरीं । हाटविदीं चौहाटीं[2] घरोघरीं । ठायीं ठायीं बोलती ॥२६॥ रावणें सीता बळेंकरून । हरोनि लंके नेली जाण । भोवतीं ठेविले राक्षसगण । अशोकनाभीतरीं ॥२७॥ जानकी सौंदर्याची खाणी । अभिलाषें ठेविली अशोक वनीं । तेथें राक्षस घोरदर्शनी । तियेभोंवतीं ठेविले ॥२८॥ तुझी कीर्ति अद्भुत लाठी[3] । वानर मेळविले कोट्यनुकोटी । शिळीं सेतु बांधोनि समुद्रतटीं । लंका नेटीं उतरलासी ॥२९॥ वधिले रावणकुंभकर्ण । राज्यीं स्थापिला बिभीषण । सीता सोडवोनि अयोध्ये गमन । प्रतापें पूर्ण तुम्हीं केलें ॥३०॥ ऐशा तुमच्या कीर्तीसी । रावणें कळंक लाविला हरून सीतेसी । तिसी न पुसतां गृहीं कैसी । एकाएकीं घातली ॥३१॥ न करिती पृच्छा[4] शोधन । जानकीस गृहीं घालोन । कैसा वर्तती रघुनंदन । लोकलाज सोडोनी ॥३२॥ आमच्या स्त्रिया ऐसें करिती । उचकणें[5] सीतेचें आम्हां देती । याकारणें लोक ऐसें बोलती । श्रीरघुपति सत्य जाण ॥३३॥ राक्षसां वश झाली सीता । नाना भोग भोगी जनकदुहिता । तिये न पुसतां श्रीरघुनाथा । घरामध्यें घातली ॥३४॥ जें आचरली सीता सती । तैसेंच आमच्या स्त्रिया वर्तती । तुझ्या आधारें आम्हां न मानिती । ऐसी वदंती[6] जनाची ॥३५॥ राजा प्रवर्ते अधर्मासी । तेथें नीति कोणीं कोणासी । शिकवावी रघुपति कायसी । या स्थितीसी देखोन ॥३६॥ यापरी बहुविध जन । नगरीं करिती विवंचन । हें सत्य श्रीरामा जाण। नाहीं अनुमान यदर्थी ॥३७॥ ऐकोनि भद्राचें वचन । परमार्थबुद्धि श्रीरघुनंदन । सर्वां सुहृदाप्रति बोले जाण । हे कथा सत्यत्वें मानते तुम्हां ॥३८॥

सभेतील इतरांचे भद्राला अनुमोदन : सभाजन म्हणती श्रीरघुनाथा । भद्र वदला जे कां कथा । ते सत्य स्वामी या अर्था । आम्हीं ऐसेंच ऐकिलें ॥३९॥ सर्वही प्रणिपात करून । श्रीरामप्रति बोलती जाण । म्हणती राजेंद्रा असत्यपण । भद्रवचना पैं नाहीं ॥४०॥ ऐसी सर्वांची वचनावळी । ऐकोनि कृपाळु ते काळीं । सभा विसर्जून हृदयकमळीं । रावणारि विचार करितसे ॥४१॥ पुढिलें प्रसंगीं सौमित्ररघुपती । संवाद एकांतीं बैसोनि करिती । एका जनार्दनी विनंती । सावध श्रोतीं परिसावें ॥४२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामभद्रसंवादो नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥४३॥ ओंव्या ॥४२॥ श्लोक ॥३॥ एवं ॥४५॥

---

शब्दार्थ – १. धरू नकोस, २. चवाट्यावर, ३. मोठी, ४. विचारपूस, ५. उदाहरण, ६. म्हणणे.

# अध्याय चव्वेचाळिसावा

॥ श्रीरामाय नमः ॥

## श्रीरामांची बंधूंशी भेट

भरत, शत्रुघ्न व लक्ष्मणांना बोलावून आणण्याची रामांची आज्ञा : विसर्जून सभेचे जन । बुद्धिनिश्चित श्रीरघुनंदन । समीप द्वारपाळासी जाण । आज्ञा करिता पैं झाला ॥१॥ अगा द्वारपाळा सज्ञाना । लक्ष्मणभरतशत्रुघ्नां । वेगीं पाचारीं मम दर्शना । कार्याकारण पैं असे ॥२॥ येरें प्रणिपात करोनि स्वामीसी। निघाला सौमित्रभवनासी । मार्गीं न करोनि विलंबासी । अति त्वरेंसीं चालिला ॥३॥

दूताच्या सांगण्यावरून तिघेही रामभेटीसाठी निघाले : वेगीं प्रवेशला सौमित्रमंदिरी । तंव संमुख लक्ष्मण ते अवसरीं । देखोनियां जोडले करीं । नमस्कार पैं केला ॥४॥ तुमचिया भेटीकारणें । बोलावूं पाठविलें रघुनंदनें । ऐसें ऐकतां लक्ष्मणें । रथारूढ पैं झाला ॥५॥ रत्नजडित स्यंदनावरी । आरूढोनि सौमित्र ते अवसरीं । चालिला जेथें कनकमृगारी[1] । बैसलासे तिष्ठत ॥६॥ लक्ष्मण चालिला देखोन । दूत प्रवेशला भरतभवन । संमुख देखोनि कैकेयी-नंदन । दोनी कर जोडोन नमन केलें ॥७॥ विनंती अवधारीं राजेंद्रा । तुमचे भेटीची उत्कंठा श्रीरामचंद्रा । बोलावूं पाठविलें गुणसमुद्रा । तुम्हांकारणें मजलागीं ॥८॥ दूतमुखींचें ऐकोनि वचन । वेगीं उठिला कैकेयीनंदन । महापराक्रमी चरणचालीं गमन । अग्रजभेटी[2] निघाला ॥९॥ भरत निघाल्याउपरी । दूत प्रवेशला शत्रुघ्नमंदिरीं । विनीत होवोनि जोडिल्या करीं । शत्रुघ्नासी नमस्कारिलें ॥१०॥ दूत म्हणे जी शत्रुघ्ना । तुमचे भेटीचें आर्त श्रीरघुनंदना । भरत लक्ष्मण अग्रजभवना । भेटावया पैं गेले ॥११॥ तुम्हांसि बोलवावयालागून । मज पाठवी श्रीरघुनंदन । तरी आतां शीघ्रगमन । श्रीरामभेटी निघावें ॥१२॥ दूतमुखींची ऐकोनि गोष्टी । शत्रुघ्न तेव्हां उठाउठीं । निघाला श्रीरामाचे भेटी । चरणचालीं सत्वर ॥१३॥ सर्वेचि दूत पुढें येवोन । श्रीरामासी करोनि नमन । म्हणे स्वामी आलेती भरत शत्रुघ्न । लक्ष्मण द्वारीं उभे असती ॥१४॥ श्रीराम चिंतातुर मानसीं । दूतासि म्हणे तिघां बंधूंसी । पाचारीं मज समीपेंसीं । त्वरेंकरोनि येथवरी ॥१५॥ सर्वेचि दूत द्वारा पैं आला । म्हणे राजपुत्र हो भीतरीं चला । तुमचे भेटीस उताविळा । श्रीराम बैसलासे ॥१६॥

तिघांचे रामांना अभिवादन : तिघे बंधु समीप येवोन । तिघीं वंदिला रघुनंदन । मुख कोमाइलें कळाहीन । जैसा शशी ग्रहणाचा ॥१७॥ तिहीं राम देखिला कैसा । संध्याकाळींचा सूर्य जैसा । अति दीनमुख चंद्र कळाषोडशा । उतरोनि जैसा द्वितीयेचा ॥१८॥ हतशोभा मुखकमळीं । जैसी कमळिणी सुके जळीं । हृदयीं चिंतेची काजळी । तयातें जाणों सरली पैं ॥१९॥ ऐसा श्रीराम कळाहीन । देखोनि तिघे बंधु जाण । श्रीरामचरणीं मस्तक ठेवोन । दीर्घ नमस्कार तिहीं केला ॥२०॥ तयांचा देखोनि अति आदर । वेगीं उठवी धरणिजावर[3] । दोहीं बाहीं आलिंगूनि सत्वर । तिघे बंधु सुखी केले ॥२१॥ बैसवोनि तिघे बंधु । तयांसी बोलिला कृपासिंधु । तुम्ही माझे सखे सुहृदु । प्राणाहुनि पढियंते ॥२२॥ तुमचे आज्ञेकरून । मी राज्य करितों श्रीरघुनंदन । तुम्ही कुशल ज्ञाते शास्त्रज्ञ । स्वधर्मी निपुण पैं तुम्ही ॥२३॥ तुम्ही मजलागीं करितां स्वकर्म । तुम्ही मजलागीं करितां स्वधर्म । तुम्ही मजलागीं करितां व्रतनेम । धर्मपरायण पैं तुम्ही ॥२४॥ ऐसें श्रीरामाचें वचन । ऐकोनि तिघें बंधु जाण । हृदयीं

---

शब्दार्थ - १. मारीचशत्रू रामचंद्र, २. ज्येष्ठ बंधूच्या भेटीला, ३. श्रीराम.

निवाले परी मुख देखोन । झाले आपण चिंतातुर ॥२५॥ एका जनार्दना शरण । पुढे बंधूंसीं संवाद होईल जाण । मग सीतावनप्रयाण । लक्ष्मण जाऊन करील ॥२६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामबंधुदर्शनं नाम चतुश्चत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥४४॥ ओंव्या ॥२६॥

## अध्याय पंचेचाळिसावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

### श्रीराम व बंधूंचा विचारविनिमय

समीप करोनि तिघें बंधु । तयांप्रति बोले कृपासिंधु । मुख कोमाइलें नयनीं बिंदु । अंबकाचे[1] पडताती ॥१॥ अंग चळचळां कांपत । आकुळ व्याकुळ होय चित्त । बोलतां तोंड कोरडें पडत । अवस्था[2] आकळित राघवा ॥२॥ अंतरीं राम चैतन्यघन । बाह्य चिंतातुर दीन । अंतरीं राम सुखसंपन्न । बाह्य उद्वेगें मन व्यापिलें दिसे ॥३॥ अंतरीं राम नैराश्य । बाह्य दाखवी आशापाश । अंतरीं श्रीराम सर्वज्ञ परेश । बाह्य विचार पुसतसे ॥४॥ अंतरीं श्रीराम सुखसागरू । बाह्य दिसे व्यवहारी अति चतुरू । अंतरीं श्रीराम सद्गुरू । बाह्य नरावतारू भासत ॥५॥ ऐसा श्रीराम लीलाविग्रही[3]। नानावतार धरी पैं देहीं । देहबुद्धि तया नाहीं । व्यापकपर्णेकरोनियां ॥६॥ कनकमृगारी सर्वांप्रती । बोलतसे ऐका निश्चितीं । तुमचें कल्याण हो आणि श्रीमंती । यश कीर्ती वृद्धी पावो ॥७॥ ऐका होवोनि सावधान । नगरीं वृत्तांत वर्तला अति गहन । पुरीं पाटणीं वसती जन । त्यांचें वर्तमान अवधारा ॥८॥

**श्रीरामांची सीतेच्या निंदेमुळे चिंता :** माझे सीतेची निंदा करिती। नाना अपवाद[4] इसी ठेविती । घरोघरीं हेंचि वदती । लोक बोलती जानकीसी ॥९॥ अधर्म माझे वदती जन । तेणें चिंतातुर मी गहन । याकारणें तुम्हांसि पाचारून । काय म्यां आपण करावें ॥१०॥ आम्हीं इक्ष्वाकुकुळींचे भूपती । आमुचे पूर्वजीं केली कीर्ती । जिहीं प्रार्थून उमापती । मागितली भागीरथी स्नानार्थ ॥११॥ मिथिलाभवनीं विदेहजनक । शास्त्रीं पुराणीं प्रसिद्ध एक । धर्मपरायण पुण्यश्लोक । ज्ञान सुभट जयाचें ॥१२॥ तयाची जानकी कुमारी । इचें कुळ प्रसिद्ध चराचरीं । उभय कुळें वंद्य सुरासुरीं । प्रसिद्ध प्रौढी तैसीच ॥१३॥ जाणतसां दंडकारण्यीं । वसती केली आम्हीं तिघां जणीं । तेथें रावण दुरात्मा येवोनी । जानकीसी हरिलें तेणें ॥१४॥ म्यां रावणासी मारून । जानकी सोडविली हें सत्य जाण । तेव्हांच म्यां केलें अव्हेरण । लोकलाजेसी भिवोनी ॥१५॥ जानकी मज संमुख येवोनी । इसी मी विमुख होवोनी । ते काळीं सर्वही सुरगणीं । थोर आश्चर्य पाविजेलें ॥१६॥ मग जानकी सुंदरी । दिव्य देती झाली ते अवसरीं । देवां देखतां वैश्वानरीं । प्रवेशली ते काळीं ॥१७॥ सीतेनें दिव्य दिधलें । इंद्रें माझें प्रार्थन केलें । तेव्हां लक्ष्मणें विनविलें। जानकीतें अंगीकारा ॥१८॥ मान देवोनि समस्तांच्या वचना । म्यां अंगकारिली हे शुभानना[5] । माझिया हृदयींची भावना । निष्पाप देखोनि अंगीकारिली ॥१९॥ आकाशपथीं पंच भूतें । तींही म्हणती निष्पाप जानकीतें । अंगीकारावें समर्थे । कृपा करोनि श्रीरामा ॥२०॥ शशिसूर्यमहेंद्रीं मजप्रती । करीं ओपिली जानकी सती । यासि साक्ष प्रत्यक्ष सौमित्री । त्या काळीं जवळी होता ॥२१॥ ऐसा शुद्ध

---

शब्दार्थ - १. उदकाचे, २. चिंता, ३. लीलेने शरीर धारण करणारा, ४. दूषणे, ५. सुंदर मुखाची.

समाचार । लंकाद्वीपीं देखतां सुरवर । वर्तला हा सत्य साचार । तुम्हीं सकळीं जाणिजे ॥२२॥ मग हे जानकी सुंदरी । सहित प्रवेशलों पितृपरीं । ऐसें असतां जन घरोघरीं । नानापरींचें बोलती ॥२३॥ यालागीं आतां क्षणक्षण । होतो माझा विकळ प्राण । नगरलोकांसि भिवोन । प्राणत्याग करावा ॥२४॥

अपकीर्तीहून मरण बरे ! किर्तीसाठी सर्व काही : अपकीर्तीचे जें जिणे । लोकांमध्ये लाजिरवाणें । याहीपरीस भलें जीव देणें । परी जिणें नये कामा ॥२५॥ अपकीर्ती निंदिजे जनीं । कीर्ती वंदिजे वेदीं पुराणीं । कीर्ती आपुली ऐकोनी । सर्वांसि उत्साह होतसे ॥२६॥ कीर्तीकारणें जे जन । करिताति व्रतें तपें दान । कीर्तीकारणें यज्ञाचरण । स्वयें जाण आचरिती ॥२७॥ कीर्ती तुळापुरुषदान । कीर्तीकारणें यजनयाजन । कीर्तीकारणें अन्नदान । घरोघरीं जन करिताती ॥२८॥ कीर्तीकारणें शास्त्रपठन । कीर्तीकारणें तर्कव्याख्यान । कीर्तीकारणें करिती छळण । वादीं ब्राह्मण एकमेकां ॥२९॥ कीर्तीकरणें विजनीं[१] पाणी । पाजिताती पोही[२] घालोनी । कीर्तीकारणें पंचाग्निसाधनीं । धूम्रपानीं प्रवर्तती ॥३०॥ ऐसें जाणा कीर्तीचें सुख । अपकीर्तीचें परम दुःख । तरी आतां तूं सौमित्रा आइक । एक विचार सांगतों ॥३१॥

सीतेला वनांत वाल्मीकीच्या आश्रमी पोचविण्याची आज्ञा : हा मध्यारात्रीचा भर । निशाअंतीं उगवे दिनकर । सुमंतें अधिष्ठिला[३] जो रहंवर । त्यावरी जानकी बैसवीं ॥३२॥ गंगेचे परपारीं आपण । वाल्मीकाश्रम परम पावन । गंगातमसांचा संगम । तेथें वन गहन पैं आहे ॥३३॥ तया वनीं वृक्ष दीर्घ । वसताती जंबुक व्याघ्र । आणि क्रूर जीव अनेग । वन आश्रयोनि राहिले ॥३४॥ शीघ्र करावें या कार्यासी । विलंब झणीं येथें करिसी । अथवा मनींही विचारिसी । तरी अनर्थ होईल ॥३५॥ तेथें नेवोनि हे सुंदरी । सोडावी त्या विघ्नांभीतरीं । हे माझी आज्ञा अवश्य करीं । मज सुख व्हावया ॥३६॥ हें जानकीस कळों न द्यावें । आणि कोणा न सांगावें । शीघ्र विलंबा न करावें । झडकरी जावें निजगृहा ॥३७॥ श्रीरामाज्ञा वंदोनि शिसी[४] । लक्ष्मण निघाला स्वभुवनासी । मार्गीं चिंतातुर अति क्लेशी । सुख मानसीं पैं नाहीं ॥३८॥ येरीकडे बंधूंसह रघुनंदन । बाष्प कंठीं करी रुदन । नयनीं अश्रूंचे पूर जाण । मुख कोमेजून पैं गेलें ॥३९॥ अनुजांसहवर्तमान । प्रवेशला निजभवन । पुढील सीतावनाभिगमन । सावधान अवधारा ॥४०॥ एका जनार्दना शरण । रामें गोड रामायण । श्रीराम तारक ब्रह्म पूर्ण । सच्चिदानंदघन श्रीराम ॥४१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामसहबंधुविचारोनाम पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥४५॥ ओंव्या ॥४१॥

## अध्याय शेहेचाळिसावा

॥ श्रीसीतापतये नमः ॥

### सीतेचे वनांत गमन

तदनंतर सुमित्रात्मज । रजनी क्रमोनि गभस्ती तेजःपुंज । उदयो होतां जे वदला अग्रज । तया कार्या करीतसे ॥१॥ सुमंताप्रति बोले वचन । मुख कोमाईलें दिसे विवर्ण[५] । सारथियासहित रथ उत्तम जाण । येथें शीघ्र आणावा ॥२॥ श्रीरामाची आज्ञा ऐसी । रथीं वाहोन जानकीसी । सीतेचेही आवडी मानसीं । ऋषिआश्रम पहावे ॥३॥ मी नेतो वैदेहीतें । पहावया ऋषिआश्रम पुण्यतीर्थे । तरी सुमंता शीघ्र रथातें । आणावें आज्ञेकरोनी ॥४॥

---

शब्दार्थ - १. निर्जन स्थली, २. पाणपोई, ३. सारथ्यस्वीकार केला, ४. मस्तकी, ५. तेजोहीन.

लक्ष्मणाच्या आज्ञेप्रमाणे सुमंताने रथ आणला : ऐकोनि लक्ष्मणाचें वचन । तत्काळ सुमंतें उठोन । रथ आणिला रत्नखचित सुवर्णवर्ण । देदीप्यमान तेजस्वी ॥५॥ सुमंत म्हणे सुमित्रात्मजा । रथ आणिला कुलजा[१] । आतां करावें योजिलें काजा । महाराजा शक्रारिहंत्या[२] ॥६॥ ऐसें सुमंतमुखींचें वचन । ऐकोनि सुमित्रानंदन । प्रवेशला जेथें जनकाचें कन्यारत्न । परम पावन पतिव्रता ॥७॥

सीतेने त्या रथांतून वनश्री पाहाण्यासाठी यावे अशी लक्ष्मणाची तिला विनंती : मग तो पुरुष-पंचानन । जानकीप्रति अग्रजाचें वचन । बोलता झाला माते तुजलागोन । श्रीरामें रथ पाठविला ॥८॥ रथीं आरूढोनियां भद्रे । तुम्हीं वन पहावया श्रीरामचंद्रें । पाठविलें वो गुणसमुद्रे । गंगेचिये पैलतीरा ॥९॥ मजबरोबरी वो शुभानने । रथीं बैसोनियां वनें उपवनें । पाहें ऋषिआश्रम सिद्धस्थानें । तपोधन जेथें वसती ॥१०॥ शीघ्र चाल वो झडकरी । श्रीरामाज्ञा वंदोनि शिरीं । तुझे मनोरथ वनांभीतरीं । पाहतां पूर्ण करीन पैं ॥११॥ तुवां श्रीरघुनाथा मागितलें । तें तुज श्रीरामें दिधलें । आतां चालिजे शीघ्र काळें । वनवासासी जनकात्मजे ॥१२॥ ऐसें सौमित्र बोलिल्यावरी । जानकी संतोषोनि ते अवसरीं । वना जावयाचा उल्हास भारी । हृदयमंदिरीं उंचबळला ॥१३॥

सीतेने निघण्याची तयारी केली, परंतु अपशकुनामुळे ती सचिंत : वनवासी ऋषीकारणें । सर्वे घेतलीं दिव्य वस्त्रें भूषणें । नानापरींचीं रत्नें धनें । फळें मिष्टान्ने घेतलीं ॥१४॥ विजनीं मुनिपत्न्या सती । तयां द्यावया भूषणें सीता सती । घेती झाली होती आइतीं । नानाविध वस्त्रेंही ॥१५॥ वैदेही म्हणे सुमित्रासुता । मोटा बांधोनि घालिजे रथा । वनीं वसती ऋषींच्या कांता । त्यांसी द्यावयाकारणें ॥१६॥ पुनरपि बोले मैथिली । लक्ष्मणा मी तुजजवळीं । विनंती करितें ये काळीं । सावध होवोनि अवधारिजे ॥१७॥ मी पाहीन ऋषिआश्रमातें । अशुभचिन्ह मज कां होतें । वामनेत्राचें लवतें पातें । सर्वांगीं कंप होतसे ॥१८॥ शरीरीं अवस्था वाटत । हृदयीं चिंता वर्तती बहुत । धारणा[३] माझी चंचळ होत । वनवासासी जावया ॥१९॥ लक्ष्मणा आजि हे पृथ्वी । उद्वस वाटते माझे जीवीं । दिशा दाटल्या बहुत धुई[४] । कळाहीन सूर्य दिसतसे ॥२०॥ माझा भ्रतार माझे दीर । सासू सुहृद आणि सहोदर । श्रीरामभक्त श्रीरामकिंकर । पुरवासी जन सुखी असो ॥२१॥ ऐसें जानकी वदोन । स्तुति करी देवता प्रार्थून । अहो अंबिके हा रघुनंदन । सुहृदेंसी कल्याण असो ॥२२॥ ऐसें जानकी वदल्यावरी । लक्ष्मण विनीत जोडिल्या करीं । म्हणे माते तुझ्या उत्तरीं । सर्वांसीं क्षेम होईल ॥२३॥ धरणिजे तुझे आशीर्वादें । माझे मनोदेवतेसी निघाली दोंदें । तुवां चिंतिलीं कल्याणशब्दें । तरी सर्वांसी कल्याण पैं असे ॥२४॥

लक्ष्मण सीतेसह गोमतीतीरावर आला : तदनंतर आरूढोनि रथीं । प्रयाण करी वनाप्रती । नगर सांडोनि प्रथम वस्ती । गोमतीतीरी पैं केली ॥२५॥ गोमतीचें तीर पावन । तिचे उत्तरे नैमिषारण्य । जेथें सदाशिव आपण । पार्वतीसहित पैं असे ॥२६॥ तया क्षेत्रीं अद्यापि जाण । वाळूच्या लिंगाचे दर्शन । करिती जन पुण्यपावन । अभक्तां सहसा लिंगदर्शन नाहीं ॥२७॥ ऐसिये गोमतीप्रती । प्रथमदिवशीं केली वस्ती । उदय होतांचि गभस्ती । सारथ्यासि म्हणे लक्ष्मण ॥२८॥ शीघ्र संजोगी रे रथ । आजि भागीरथीतीरीं सुस्नात । स्नान तर्पण करूं तेथ । माध्यान्हिक

शब्दार्थ - १. महाकुलीना, २. इंद्रजितास मारणाऱ्या, ३. बुद्धी, ४. धुक्याने.

कर्मातें ॥२९॥ आजि भागीरथीचें पाणी । मस्तकीं धरूं सुस्नात होवोनी । जैसे ईश्वरें मौळीचिये[1] स्थानीं[1] । विष्णुपादोदक धरियेलें ॥३०॥ शक्रारिअरीचें ऐकोनि वचन । सारथियानें शीघ्रचि जाण । रथ संजोगिला मनाहून । वेग बहुत वारूंचा ॥३१॥

गंगाकिनारी आगमन : आरूढोनि रथावरी । सीतेसहित रावणात्मजारी । पावले पंचदश घटिकांभीतरीं । भागीरथीच्या तीरातें ॥३२॥ तेथें करोनि संध्यास्नान । पितृतर्पण ब्राह्मण-पूजन । माध्यान्हिक क्रिया सारून । उद्वेगी मन सुमित्राचें ॥३३॥

लक्ष्मणाचे दुःख पाहून जानकी त्याला धीर देते : आठविली अग्रजाची[2] मात । जे सीता त्यागीं वनांआंत । तो काळ समीप जाणोनि सौमित्र । स्फुंदस्फुंदोनि रडतसे ॥३४॥ लक्ष्मणाचें देखोनि रुदन । धर्मज्ञ जानकी बोले वचन । तुम्ही रडतां काय कारण । जान्हवीतीर पाहोनियां ॥३५॥ जान्हवीतीर पुण्यपावन । इचें दर्शन कल्मषदहन[3] । इचा महिमा चतुरानन । वर्णूं न शके स्ववाचा ॥३६॥ हा माझा हर्षकाळ । ईस देखोनि सुखकल्लोळ । तुम्ही रुदन करावया काय मूळ । तें मजप्रति सांगिजे ॥३७॥ श्रीरामासमीप पार्श्वभागीं । वस्ती लक्ष्मणा तुम्हां-लागीं । या वियोगदुःखें तुम्ही फुंदां आंगीं । शोकसागरीं पडतां हो ॥३८॥ मजसारिखी प्रीति तुजवरी । अधिक लक्ष्मणा श्रीराम करी । शोक सांडोनि ये अवसरीं । मज परपारीं उतरावें ॥३९॥ परपारीं आम्ही उतरोन । तेथें वसती मुनिगण । तयांचें करूं दर्शन पूजन । अलंकारभूषणें देवोनी ॥४०॥ तेथें एक रात्री करूं वस्ती । प्रभाते अयोध्यापुरीप्रती । गमन कीजे श्रीरघुपती । जेथे राज्य करितसे ॥४१॥ शीघ्र लक्ष्मणा ये समयीं बरवी । विस्तीर्ण सुंदर नाव आणवीं । पैलतीरीं उतरोन गोसावी । महानुभावांसी भेटणें ॥४२॥ हें ऋषिरामायण । उत्तरकांड कल्मषदहन । एका जनार्दनीं विनंती पूर्ण । संत सज्जन परिसा तुम्ही ॥४३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सीतालक्ष्मणवनाभिगमनंनाम षट्चत्वारिंशोऽध्याय: ॥४६॥ ओंव्या ॥४३॥

## अध्याय सत्तेचाळिसावा

॥ श्रीजनकनंदिनीपतये नमः ॥

### सीतेचे वनाभिगमन

परतीला पोहोचली : अयोनिजेच्या मुखकमळें । ऐसं वदतां सुमित्रेच्या बाळें । नावाडी पाचारिला कुशळें । सुंदर नौका आणविली ॥१॥ कैवर्तें[4] नौका सुंदर पूर्ण । आणोनि म्हणे करा जी आरोहण । धरणिजेसहित ऊर्मिलारमण । नावेवरी बैसला ॥२॥ रथसहित तेथवां सूत । ऐलतीरीं राहोन त्वरित । पैलतीरीं दोघे उतरोनि तेथ । स्नानसंध्या सारिली ॥३॥

लक्ष्मणाचा दुःखावेग : शोकें संतप्त लक्ष्मण । बोले जानकीप्रति सद्गद वचन । म्हणे माते निमित्तधारी जाण । जनासारिखें श्रीराम आचरला ॥४॥ मज जी येथें येतें मरण । तरी पावतो कृतकल्याण । हें माझेनि दुःख न देखवे जाण । काय आपण करावें ॥५॥ जरी मज मरण येतें । तरी मी पावेतों महायशातें । अपेशपात्र झालों सुहृदांतें । मुख कैसें दाखवूं ॥६॥ हें मजयोग्य नव्हे काम । सांगता झाला आत्माराम । बिभीषणा सुग्रीवा योग्य परम । ते हें

शब्दार्थ - १. मस्तकी, २. वडील बंधूची, ३. पापनाशन, ४. नावाड्याने.

तत्क्षणीं करिते हो ॥७॥ पूर्वी आचरलों होतों पाप । तें माझें मज फळलें सद्रूप । निंद्य लोकीं तें मजकरवीं भूप । ऐसे प्रयोजनीं प्रेरित ॥८॥ ऐसें करितां दीर्घ रुदन । मूर्च्छापन्न पडे लक्ष्मण । सर्वेचि मूर्च्छा सांवरून । आक्रंदोन पैं उठे ॥९॥ ऐसें सौमित्राचे रुदनदुःख । ऐकोनि जानकी कळवळली देख । लक्ष्मणासि म्हणे महाबाहो ऐक । काय कारण रुदन करिसी ॥१०॥ या काळीं लक्ष्मणा । कां करिसीं तूं रुदना । काय तुज अग्रतुल्या वाग्बाणा । हाणोनि भेदलें हृदय तुझें ॥११॥ काय चुकलासि श्रीरामाचें । कोण कर्म घडलें तुज साचें । किंवा अपवाद श्रीरघुपतीचे । तुवां केले लक्ष्मणा ॥१२॥ कीं श्रीरामें शापिलें । कीं कोण दुःख तुज ओढवलें । तें सत्य मजप्रति ये काळें । विशद करून सांगावें ॥१३॥ माझी आज्ञा तुज सौमित्रा । सांगें सकळही वृत्तांता । कांहीं वंचिसी तरी आण आतां । माझी तुज पैं असे ॥१४॥ ऐकोनि जानकीचें वचन । लक्ष्मण अधोमुख[1] दीन होवोन । कंठीं बाष्प सद्गदित मन । बोलता झाला ते समयीं ॥१५॥

सत्यस्थिती लक्ष्मणाने सीतेला निवेदिली : अहो धरणिजे अवधारीं । तुझी निंदा करिती जन नगरीं । पाटणीं[2] विजनीं घरोघरीं । हाट चौहटा[3] बैसोनियां ॥१६॥ रावणें सीता हरिली । ते नेवोनि लंकेस ठेविली । अशोवनीं राक्षस बळी । तिजपासीं रक्षण ठेविले ॥१७॥ तिचा ऐसा समाचार । पापिष्ठां राक्षसां नाहीं विचार । मग त्या रावणा मारोनि श्रीरघुवीर । अयोध्येसि घेवोनि आला ॥१८॥ एकाएकीं न पुसत । जानकी गृहीं घाली श्रीरघुनाथ । ऐसें श्रीरामें अधर्मकृत्य । सूर्यवंशीं पैं केलें ॥१९॥ तेणें जानकी भयभीत । श्रीराम झाला भयचकित । तयाचें हृदय झालें तप्त । अति दुःखित लोकलज्जे ॥२०॥ ऐसा श्रीराम मजजवळी । वदलासे सत्य ये काळीं । नगरअपवाद हृदयकमळीं । सकळांमाजि बैसले ॥२१॥ माझी पतिव्रता जानकी । परम पावन त्रैलोक्यीं । परी मज निंदिलें ये लोकीं । पुरपाटणीं घरोघरीं ॥२२॥ तरी आतां तूं लक्ष्मणा । वनासि नेईं पद्मनयना । गंगातीरीं तपोधन नाना । तदाश्रमाप्रति सोडावी ॥२३॥ करूं नये स्त्रियेचें हनन । त्यावरी गरोदर जाण । भरले षण्मास पूर्ण । वधितां दारुण पातक ॥२४॥ इजसीं रथीं बैसवोन । सौमित्रा वेगीं करी गमन । भागीरथीपरपारीं तपोधन । तेथें नेवोन सोडावी ॥२५॥ ऐसें जानकी वर्तमान । यथार्थ वदला रघुनंदन । तेणं दुःखे माझें मन । खेदें क्षीण होतसे ॥२६॥ तरी धरणिजे तीर पावन । येथें वसती पवित्र जन । या वनाचें नाम तपोवन । साधु सज्जन रहावया ॥२७॥ तरी जानकिये अवधारीं । तुवां रहावें या वनाभीतरीं । येथें वाल्मीक तप करी । तो मित्र राया दशरथाचा ॥२८॥ तयाचे चरण आश्रयून । करावें फळमूळभक्षण । श्रीरामीं अखंड अनुसंधान । लावावें जाण जानकिये ॥२९॥ श्रीरामीं ज्याची चित्तवृत्ती । तो नर वंद्य त्रिजगतीं । श्रीरामीं ज्याची अभक्ती । त्या नरकीं वस्ती आकल्पवरी ॥३०॥ ऐसी करितीं श्रीरामभक्ती । तैं चारी मुक्ति पायां लागतीं । सकळ स्वार्थ घरीं रिघती । पुरुषार्थ होती कामारे[4] ॥३१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां जानकीवनाभिगमनं नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥४७॥ ओंव्या ॥३१॥

---

शब्दार्थ - १. खाली तोंड करून, २. शहरी, ३. चवाट्यांवर, ४. दास.

# अध्याय अठ्ठेचाळिसावा

॥ श्रीशिवरामाय नमः ॥

## सीतेचा विलाप

सीतेचा आक्रोश : लक्ष्मणाचें निष्ठुर वचन । ऐकोनि जानकी खेदें खिन्न । थोर विषाद[1] पावोन । मूर्च्छागत पैं झाली ॥१॥ सुकुमार जैसी कर्पूरजननी[2] । अनिळ[3] झगटें येवोनी । मग ती डोले हादरोनी । तैसें अवनिजेसि[4] जाहलें ॥२॥ ते पडे धरणीं मूर्च्छागत । भ्रमें व्याकुळ झालें चित्त । क्षण एक होवोनि सावचित्त । लक्ष्मणा बोले दीन वचनें ॥३॥ जनकात्मजा म्हणे सुमित्रासुता । माझें शरीर दुःखातें तत्वतां । ऐसें जाणोनि कीं विधाता । दुःखासी पात्र मज केलें ॥४॥ पूर्वी जैसें आपण केलें । कोणां स्त्रीपुरुषां असे विघडिलें । तरी मज हें प्राप्त झालें । वनवासासी सांडिलें श्रीरामें ॥५॥ ऐसा जाणोनियां वृत्तांत । वनीं मज त्यागी श्रीरघुनाथ । माझें पाप मजचि फळत । वियोग होत श्रीरामीं ॥६॥ जन्मापासोनियां जाणा । हेंचि मज प्राप्त ऊर्मिलारमणा । तरी अदृष्टचि प्रमाणा । बोल कवणा ठेवावा ॥७॥ पूर्वी मी श्रीरामभवनीं । करीत असतां सेवा चरणीं । मज गृहीं अनुदिनीं । दुःख थोर जाहलें ॥८॥ पुढें आतां ऋषिआश्रमस्थानीं । वसतां मज पुसतील मुनी । काय कारण तुजलागोनी । श्रीरामें वनीं सांडिलें ॥९॥ मज पुसतील ऋषीश्वर । काय कारणें तुज रघुवीर । वनीं सांडी हें प्रश्नोत्तर । आम्हांप्रति सांगिजे ॥१०॥ तुज कोण्या दुःखास्तव श्रीरामें । त्यजिलें वनीं अवो रामे[5] । काय दुष्कर्म कोण्या अधर्मे । तुज वनीं सांडिलें ॥११॥ काय सांगूं मुनींप्रती । जरी मुनिपत्न्या मज पुसती । तूं सुंदर सुकुमार श्रीरघुपतीं । कां वों तुज सांडिलें ॥१२॥ निश्चयें जाण लक्ष्मणा । जान्हवीतीरीं आपुले प्राणां । त्यजीन मी आतां वांचेंना । कांहीं कारण मज नाहीं ॥१३॥

सीतेने लक्ष्मणाला अयोध्येस जाण्यास सांगितले : मज सांडोनियां सुमित्रासुता । करीं रघुनाथाज्ञेतें तत्वतां । मज दुःखीं वनस्थळीं सांडोनि आतां । अयोध्येसि गमन करावें ॥१४॥ आतां लक्ष्मणा माझें वचन । तुवां करावें अवश्य जाण । माझिया सासवांसि विशेषेकरून । नमन माझें सांगावें ॥१५॥ तुमचें दीन वनवासीं । वास करितें तुमचें आज्ञेसीं । जळावेगळी शफरी[6] जैसी । तैसी वनवासीं तुम्हांवीण ॥१६॥ दोनी करकमळें जोडून । श्रीरामा माझें साष्टांग नमन । जाणसी तैसें लक्ष्मणा आपण । विनंती माझी सांगावी ॥१७॥ तुझिया चरणांचा वियोग । तोचि माझा प्राणभंग । जैसा चातक मेघउद्वेग । जळ असोनि पैं करी ॥१८॥ भक्तकृपाळू श्रावणारिनंदनें[7] । मज सांडिलें लोकलज्जेभेणें । लौकिकासारिखें वर्तिजे जेणें । तोचि एक पुरुषार्थी ॥१९॥ पिता राज्यीं स्थापितां जेणें । सापत्न मातेचेनि वचनें । राज्य सांडोनि वना जाणें । तोचि एक पुरुषार्थी ॥२०॥ अहंकामादिक राक्षस । मारोनि पावला जो यश । सुरवर पूजिती जयास । तोचि एक पुरुषार्थी ॥२१॥ लोकलज्जेसि भिवोनी । ममता योषितेसी सांडिली ज्यांनीं । ये जनीं वनीं त्रिभुवनीं । तोचि एक पुरुषार्थी ॥२२॥ सर्व कर्मी कुशळपण । समता दया सेवी जयाची आंगवण । जया अहं ममता नाहीं जाण । तोचि एक पुरुषार्थी ॥२३॥ सद्गुरुवचनीं दृढ भाव । गुरु म्हणे तें करी निःसंदेह । म्हणोनि भजनीं जयाचा उत्सव । तोचि एक पुरुषार्थी ॥२४॥ गृहकृत्यीं उदासभूत । तयांत असोनि जो

---

शब्दार्थ – १. दुःख, २. देवकेळ, ३. वायू, ४. सीतेला, ५. सुंदर स्त्रिये, ६. मासोळी, ७. श्रावणशत्रू (दशरथ) पुत्र रामाने.

अलिप्त । कामिनीकामातें नातळत । तोचि एक पुरुषार्थी ॥२५॥ ऐसिया श्रीरामासी जाण । करितें मी साष्टांग नमन । हें लक्ष्मणा अवश्य सांगोन । कृपा कीजे मजवरी ॥२६॥ पौरजनांची बरवी मात । ऐकोनि मज त्यागी श्रीरघुनाथ । ऐसें जाणोनियां मी येथ । शोक न करीं सर्वथा ॥२७॥ पुरवासियांचे मनोगत । जाणोनि राजा तैसें वर्तत । याकारणें मी शोक येथ । काय कारणें पैं करूं ॥२८॥ भ्रतारच्या जें मनीचें । तेंचि स्त्रियेनें कीजे साचें । आन करितां दोष पृथ्वीचे । बैसतील मज माथां ॥२९॥ इतुकें हें माझें वचन । सांगावें श्रीरामासि आपण । दयासागर तूं ऊर्मिलारमण । यदर्थी आळस न करावा ॥३०॥ ऐसी जानकीची करुणामात । अति पराक्रमी सुमित्रासुत । ऐकोनि प्रदक्षिणा करित । दीर्घस्वरें रुदन करोनी ॥३१॥ क्षणैक सौमित्रें धरोनि ध्यान । माते तुज पाहतां नये जाण । पूर्वी तुझें देखिले चरण । रूप नाहीं देखिलें ॥३२॥ श्रीराम नसतां येथें जाण । केंवी मी पाहूं तुझे वदन । म्हणोनि अधोमुखें आपण । चरणध्यान केलेंसे ॥३३॥

**सीतेला वंदन करून लक्ष्मण अयोध्येला निघाला :** ऐसा धरणिजेस नमस्कारू । नावे बैसला शक्रजितशत्रू । नावाडियासि म्हणे सत्वरू । उत्तरपारीं पाववीं ॥३४॥ ऐसा उतरोनि पैलपारीं । शोकें संतप्त हृदयाभीतरीं । भ्रांत होवोनि रथावरी । बैसता झाला ते काळीं ॥३५॥ पुनः फिरोनि पाहे लक्ष्मण । परतीरीं सीता दीनवदन । सीताही अवलोकी लक्ष्मण । कळाहीन देखिला ॥३६॥ परतीरींहूनि जोंपर्यंत । सीता पाहे रथ दिसत । रथ न देखतां मूर्च्छागत । धरणिजा धरणीवरी पडली ॥३७॥ ते सीता दुःखेंकरून । अत्यंत आरंबळे[२] त्यजूं पाहे प्राण । सवेंचि मूर्च्छा सांवरून । रुदनधर्म मांडिला ॥३८॥

> सा दुःखभारावनता यशस्विनी यशोधना नाथमपश्यती सती ।
> रुरोद सा बर्हिणनादिते वने महास्वरं दुःखपरा च जानकी ॥१॥

**जानकीचा विलाप :** ते जानकी पतिव्रता यशस्विनी । दुःखभारें वनीं आक्रंदोनी । धराधर[३] श्रीरामलागूनी । पाहतसे ते सती ॥३९॥ अनाथबंधो अनाथनाथा । अनाथा जना तूं रघुनाथा । कां न पावसी कृपानाथा । मज ये वनीं सांडोनी ॥४०॥ म्हणोनि करितें रुदन । हें भयानक अत्यंत वन । मयूर गर्जना करिती गहन । तेणें भय दुःख वाटतसे ॥४१॥ काय म्यां तुमचा अपराध केला । कोणें माझा अन्याय देखिला । काय कारणें त्यागून गेला । वनवासीं सौमित्र ॥४२॥ कां स्वामी मज सांडिलें । मीं काय अन्याय आचरलें । कीं माझी अभक्ति देखोनि अव्हेरिलें । वनवासीं निरंजनीं[४] ॥४३॥ कीं पंचवटिकेमाजी लक्ष्मणा । अति दुरुक्ती केलें छळणा । तेणें रागें श्रीरघुनंदना । मज वनवासीं सांडिलें ॥४४॥ ऐसा शोक अत्यद्भुत । वनीं जनकात्मजा असे करित । तिच्या शोकाची वर्णना येथ । काय म्हणोनि करावी ॥४५॥ मुळींच शोक मिथ्या जाण । तयाचें मिथ्या करितां वर्णन । जानकी अशोक[५] आपण । शोकरुदन लौकिकीं ॥४६॥ एका जनार्दना शरण । सीता शोकें अति दीन । वनींचे पक्षी करिती रुदन । धरणिजादुःख देखोनी ॥४७॥ पुढें वाल्मीकमुनि येवोनी । करील सीतेची संबोखिणी । तें परिसावें संतसज्जनीं । दत्तचित्त होवोनी ॥४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सीताशोकनिरूपणं नाम अष्टचत्वारिंशोऽध्यायः ॥४८॥ ओंव्या ॥४८॥ श्लोक ॥१॥ एवं ॥४९॥

---

शब्दार्थ - १. इतर अन्य, २. आक्रोशाने, ३. राजा, ४. अरण्यांत, ५. शोकरहित.

# अध्याय एकूणपन्नासावा

॥ श्रीसच्चिदानंदाय नमः ॥

सीता व वाल्मीकी भेट

**ऋषिपुत्रांकडून सीता दृष्टीस पडल्याची वाल्मीकींना वार्ता कळते :** सीता वनीं हिंडतां एकली । शोक करितीं ऋषिपुत्रीं देखिली । ते समस्त येवोनि वाल्मीकाजवळी । नमस्कार करिते पैं झाले ॥१॥ ते समस्तही मधुरवचनीं । अहो जी ब्रह्मात्मजशिष्या[1] वाल्मीकमुनी । अपूर्व एक देखिलें नयनीं । एक स्त्री रुदन करितसे ॥२॥ रूपें तरी मन्मथजननी । सुंदर सुकुमार दीर्घस्वनीं । रुदन करितसे वनीं । अभिप्राय मुनि न कळे तिचा ॥३॥

**नैव देवी न गंधर्वी नासुरी नच किन्नरी ॥ एवं रूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले ॥१॥**

नव्हे देवांची देवता । नव्हे गंधर्वांची कांता । नव्हे असुरांची वनिता । किन्नरयोषिता ते नव्हे ॥४॥ नव्हे जळींची जळदेवता । नव्हे ऋषींची ऋषिकांता । ऐसिया रूपाची देखिली योषिता । महीतळामाझारी ॥५॥ तरी स्वामी आपुले नयनीं । पहावी तेथवरी कष्टोनी । तिचा अभिप्राय देखतां मुनी । सर्वथा कळेल तुम्हांसी ॥६॥ गंगातीरीं करी रुदन । जैसी अनाथ कोणी नाहीं दीन । तियेची काकुळती न देखवे म्हणोन । कृपाळुवा तुम्हां श्रुत केलें ॥७॥ शोका योग्य नव्हे ते सती । परी बहुत दुःखें करी ग्लांती[2] । यालागीं स्वामींनी शीघ्रगती । तीतें दृष्टीं पहावें ॥८॥ तिचें करावें पूजन । तरी तुम्हां अयोग्य अगणिक पुण्य । त्याहीवरी तुम्ही धर्मपरायण । मानेल तैसें करावें ॥९॥ तुमच्या निकट ना दुरी । रुदन करितसे सुंदरी । मज तारिता नाही म्हणोनि शरीरीं । अत्यंत दुःख करीतसे ॥१०॥ तुम्हांसि आली शरणागत । हें स्वामींनीं जाणिजे निश्चित । ऐसें ऐकोनि तयांसी वदत । धर्मनीति जाणता ऋषि ॥११॥

**सीता होती तेथे वाल्मीकी आले, तिचे सांत्वन :** तो जो वाल्मीक महाऋषी । तपस्तेजें तपोराशी । जेथें मैथिली होती त्या प्रदेशीं । पूजा घेवोनि पैं आला ॥१२॥ सवें ऋषी शिष्यपरिवारित । घेऊन वाल्मीक धांवत । जेथें जानकी होती तेथ । शिष्यांसहित पैं आला ॥१३॥ देखिली सीता तत्क्षणीं । म्हणे होय हे राघवपत्नी । कैसी जानकी देखिली नयनीं । तें सावधान अवधारा ॥१४॥ जैसी वणव्यानें आहाळली[3] वल्ली । कीं जीवनेंवीण[4] धान्यें करपलीं । कीं जळावेगळी मासोळी । तैसी तळमळी पैं सीता ॥१५॥ ऐसें देखोनि सीतेसी । मधुरवचनीं वाल्मीक महाऋषी । म्हणे माते तूं श्रीरामाची जाया होसी । अजात्मजाची[5] ज्येष्ठ सून तूं ॥१६॥ मिथिलाभूमीचा जनक राजा । तयाची सत्य तूं आत्मजा । या पतिव्रतांहूनि तुझा । धर्म आगळा धरणिजे ॥१७॥ तूं आलीस ज्या कार्यालागूनी । तें मज कळलें जाण मनीं । त्रैलोक्यीं वर्ततें तें तपेकरूनी । मज ठाऊकें असे सीते ॥१८॥ तूं निष्पाप पतिव्रते । ऐसें ठाऊकें आहे मातें । आतां माझिया पूजेतें । दुःख सांडोनि अंगीकारीं ॥१९॥

**वाल्मीकींकडून सीतेला आश्रमांत आश्रय :** जैसी आपुले गृहीं वससी । तैसीचि राहे माझे आश्रमसन्निधीसीं । मग पूजोनियां ऋषीं । स्वाश्रमासी सीता नेली ॥२०॥ मग तो वाल्मीक महामुनी । त्यासवें सीता देखोनी । ऋषिपत्न्या आणि तपस्विनी । सामोऱ्या येत्या पैं झाल्या ॥२१॥ ऋषि सीतेसहित आला देखोन । मुनिपत्न्यांही करूनि नमन । म्हणती स्वामी आलेती सीता घेवोन । थोर सुख आम्हा झालें ॥२२॥ हें सुदर चांफेगोरटी । दुःख करितां श्रमली

शब्दार्थ - १. नारद शिष्य, २. दुःख, ३. पोळली, ४. उदकावाचून, ५. अजपुत्र दशरथाची.

मोठी । सर्वेचि[१]वाल्मीक जगजेठी । बोलतसे ऋषिपत्न्यांसी ॥२३॥ हे सीता म्हणाल कोण । वना यावया काय कारण । भ्रतारें कां सांडिली अवगुण । काय इचा देखिला ॥२४॥

ऋषिस्त्रियांना सीतेची कथा सांगितली : तरी सावकाश करोन चित्त । ऐका धरणिजेचा वृत्तांत । इचा भ्रतार श्रीरघुनाथ । जेणें रावणांत[२]समूळ केला ॥२५॥ हे राया दशरथाची सून । जनक विदेहाचें कन्यारत्न । निष्पाप पतिव्रता जाण । कांही कार्य लक्षोन वना आली ॥२६॥ तें कोण कार्य म्हणाल चित्तीं । तरी मी सांगतों तुम्हांप्रती । पुढील भविष्य जाणोनि सत्यार्थी । करावया हे आली ॥२७॥ इचेनि माझें वचन सत्य । इचेनि माझें तप सफळित । इणें मज करोनि अनुग्रह येथ । वनवासासी पैं आली ॥२८॥ हें मिथ्या वाटे लोकांप्रती । हे आदिमाया चिच्छक्ती । इचा महिमा नेणती । ब्रह्मा आदि करोनी ॥२९॥ इसीं तुम्ही स्नेह करून । आपल्या समीप राहवून । क्षणक्षणां इचें समाधान । ब्रह्मत्वें पूर्ण करावें ॥३०॥ गौरवोनि मुनिपत्न्यांसी । मग तो वाल्मीक महाऋषी । शिष्यांसहित निजाश्रमासी । अति संतोषीं पैं आला ॥३१॥ पुढील कथानुसंधान । लक्ष्मण करितां अयोध्यागमन । मार्गी सारथि जो सज्ञान । त्याप्रति विलपोन दुःख सांगे ॥३२॥ एका जनार्दना शरण । कथा रम्य रामायण । समूळ तोडी भवबंधन[३] । करितां श्रवण एकचित्तें ॥३३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सीतावाल्मीकदर्शनं नाम नवचत्वारिंशोऽध्यायः ॥४९॥ ओंव्या ॥३३॥ श्लोक ॥१॥ एवं ॥३४॥

## अध्याय पन्नासावा

॥ श्रीपरब्रह्मणे नमः ॥

### लक्ष्मण-सुमंत-संवाद

येरीकडे कथासंबंधु । रावणारीचा[४]कनिष्ठ बंधु । नामें लक्ष्मण प्रतापी प्रसिद्धु । राक्षसांचा कंदु छेदक ॥१॥ ऋषिआश्रमीं मैथिली । प्रवेशली दुःखित ते काळीं । तिचेनि शोकें आतुर्बळी । महा दुःख पावला ॥२॥ हीन दीन मुखकमळ । कोमाइलें जैसें कर्दळीफळ । सीतेचा देखोनि शोक सबळ । अति तळमळ करीतसे ॥३॥

सुमंताजवळ लक्ष्मणाने जानकीवियोगाचे दुःख सांगितले : श्रीरामसारथ्या पाहें येथ । श्रीरामासी हे दुःख होईल प्राप्त । सीता पतिव्रता जाण निश्चित । वृथा ज्येष्ठें त्यागिली ॥४॥ श्रीराम येथें असता । तयासी सीतेचा शोक कळता । राघवावीण एवढ्या अनर्था । आजि म्यां दृष्टीं देखिलें ॥५॥ सुमंता प्रारब्धाचा महिमा । यासी अन्यथा करूं न शके ब्रह्मा । जे सीतेकारणें श्रीरामा । केवढा सायास प्राप्त झाला ॥६॥ मेळवोनि लतामृगांचे[५] भार । शिळीं बांधोनि सागर । रणीं दैत्य राक्षस घोर । क्रोधेंकरोन निवटिले ॥७॥ याहीपूर्वी रामें रणकर्कशें । पितयाचे वचनीं चवदा वर्षे। वनीं क्रमिलीं सीतेसरसें । थोर क्लेश पावला ॥८॥ वधोनि समस्त राक्षस । जानकीसहित पावला यश । तैं सकळां सुरवरां हर्ष । लंकाप्रांतीं पैं झाला ॥९॥ सीतेचें तेथें दिव्य[६]झालें । पतिव्रता सर्वांसी जाणविलें । जानकीतें दिधलें । देवीं श्रीरामाचे पैं हातीं ॥१०॥ ते धरणिजेसहित रघुनंदन । प्रवेशला अयोध्याभवन । नगरीच्या लोकां हर्ष

शब्दार्थ - १. लगेच, २. रावणाचा वध, ३. संसारपाश, ४. रामाचा, ५. वानरांचे, ६. अग्निप्रवेश इत्यादिकांनी सत्यपरीक्षा दाखविणे.

गहन । श्रीराम आला म्हणोनी ॥११॥ नगरासी येतां श्रीरघुनाथा । सर्वेंचि केली पट्टाभिषेकता । जानकी सहित भुवननाथा । राज्य सुखें करिता झाला ॥१२॥ सर्वेंचि पुरवासी जनीं । अपवाद[1] ठेविला रघुनंदनीं । म्हणती राखसें हरिली पत्नी । ते गृहीं केवीं घातली ॥१३॥

सुमंताकडून लक्ष्मणाचे सांत्वन : लक्ष्मणाचें ऐकोनि वचन । सुमंत सारथि बोले आपण । म्हणे लक्ष्मणा हें काय कारण । शोकातें बहुत करितोसी ॥१४॥ शोक सांडोनि राहें स्वस्थ । श्रीरामाचें अकळ चरित्र । लीलाविग्रही[2] धरणिजाकांत । संदेह येथ न धरावा ॥१५॥ पूर्वी दुर्वास मुनिश्रेष्ठ । तापसांमाजि तपोनिष्ठ । तो अयोध्ये येवोनि दशरथानिकट । कथा एक वंदू पाहे ॥१६॥ राजा आणि वसिष्ठ मुनी । मीही होतो तये स्थानीं । कथा वदला जो मुनी । ते रायें गुप्त करविली ॥१७॥ याकारणें लक्ष्मणा । ते मज सांगतां न ये जाणा । जरी ऐकावी वाटतसे मना । तरी तुजप्रति सांगेन ॥१८॥ हे प्रकट न करावी मात । तरी पुसेल शत्रुघ्न भरत । तयांसी न सांगावी निश्चित । जिव्हारी दृढ धरावी ॥१९॥ हें गुह्य अवतारचरित्र । प्रकट न करावें लौकिकांत । जें मी सांगेन तें हृदयांत । सावधान धरावें ॥२०॥ पुढिलें प्रसंगीं दुर्वासऋषी । संवाद करील दशरथासीं । ते मी सांगेन तुजपासीं । सविस्तरें अवधारीं ॥२१॥ एका जनार्दना शरण । पुढें दुर्वास रायाचें संवादकथन । सर्वांचे सार जाण । रामकथाचरित्र ॥२२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां सुमंतसारथिसंवादो नाम पंचाशत्तमोऽध्यायः ॥५०॥ ओंव्या ॥२२॥

## अध्याय एकावन्नावा

॥ श्रीमहाविष्णवे नमः ॥

### सुमंत-लक्ष्मण-संवाद

तदनंतर सारथि सुमंत । सौमित्राप्रति ऋषिभाषित[3] । सांगता झाला आनंदित । जें ऐकिलें पूर्वी होतें ॥१॥

दुर्वासांचे दशरथाकडे आगमन : पूर्वी दुर्वास महाऋषी । अत्रिपुत्र अनसूयेच्या कुसीं । जन्म पावला तपःसामर्थ्येसीं । तो दशरथभेटीसी अयोध्ये आला ॥२॥ राजा वसिष्ठ सामोरे गेले । अति सन्मानें दुर्वासा आणिलें । अर्घ्यपाद्यादिकीं[4] पूजन केलें । भोजन झालें तयावरी ॥३॥ वसिष्ठाचा आश्रम पुनीत । तेथें ऋषी वसावयार्थ । ठाव दिधला हर्षयुक्त । मुनींसमीप राहविला ॥४॥ जो दुर्वास महामुनी । तापसांमाजी शिरोमणी । जयाच्या शापें शार्ङ्गपाणी । निजस्त्रियेसीं दुरावला ॥५॥ ऐसा तो दुर्वास ऋषी । वसिष्ठाश्रमीं एक वर्षी । राहिला असतां दशरथ सूर्यवंशी । वसिष्ठगृहासि पैं आला ॥६॥ श्रीगुरूसी नमस्कार केला । सवेचि दुर्वास वंदिला । दशरथ म्हणे दयाळा । कथा एकी सांगिजे ॥७॥

राजाच्या प्रश्नावरून दुर्वासांनी श्रीराम-सीता विरहाचे कारण सांगितले : माझीं जीं पुत्रसंतानें । तयांचीं सांगावीं लक्षणें । तयांचें आयुष्य तेजें गहनें । ते वर्तमान सांगावें ॥८॥ मध्यान्हीं गेला आदित्य । ते समयीं कोणी नाहीं तेथ । वसिष्ठ दुर्वास दशरथ । चवथा तेथ मी सारथि ॥९॥ अत्रिपुत्र महाऋषी । ऐकोनी दशरथवचनासी । होवोनियां अतिसंतोषी । कथा एक सांगतसे

---

शब्दार्थ - १. दूषण, २. लीलेने देह धारण करणारा, ३. ऋषीचे वचन, ४. अर्घ्य (पूजाद्रव्ये) व पाद्य (पाय धुवावयाचे पाणी) यांनी.

॥१०॥ दुर्वास म्हणे भूपाळा । प्रौढा प्रबुद्धा[1] धर्मशीळा । ऐक इतिहास तुज प्रांजळा । ये काळीं मी सांगेन ॥११॥ पूर्वी देवां दैत्यां युद्धकाळीं । असुरांसीं युद्ध करितां वनमाळी । दैत्य पळाले भृगुआश्रमाजवळी । पुलोमेनें पाठीं घातले ॥१२॥ पुलोमेनें दैत्य पाठीसी घातले । हे श्रीविष्णूसी कळलें । करी चक्र घेवोनि मारिलें । पुलोमेसी ते काळीं ॥१३॥ शिर तुटोनि पडिलें भूमीसी । सवेंचि आश्रमा आला ऋषी । म्हणे कोणें माझिया स्त्रियासी । आश्रमासीं मारिलें ॥१४॥

भृगूचा विष्णूंना शाप : ऐसें अकृत्य गेला करून । तो मनुष्यलोकीं जन्मेल जाण । ऐसा शाप ऋषि देवोन । मग ध्यानस्थ पैं झाला ॥१५॥ ध्यानीं आव्हानूनी[2] मूर्ती । तिणें सांगितलें तुझी सती । विष्णूनें मारिली निश्चितीं । चक्रेकरोनि ऋषिवर्या ॥१६॥ हरीनें स्त्रियेसि मारिलें । ऐसें ऋषीलागोनि कळलें । पुनरपि शाप तया काळें । मागुता दुसरा पैं दिधला ॥१७॥ माझे स्त्रियेतें मज विघडिलें[3] । तोही ऐसेंच पावेल कोणे काळें । ऐसें ऋषीच्या मुखे निघालें । वचन ते काळीं ॥१८॥ सवेंचि ऋषि धर्मपरायण । म्हणे मी शाप वदलों तप वेंचून[4] । तरी आतां करूं विष्णूपूजन । जेणें भगवान संतोषे ॥१९॥ षोडशोपचारीं करोनि पूजा । ऋषि म्हणे जी गरुडध्वजा । थोर अन्याय झाला माझा । जें तुज म्यां शापिलें ॥२०॥ हरि म्हणे भविष्य प्रमाण । तें ऋषिवर्या न चुके जाण । यालागीं खेदें खिन्न आपण । न व्हावें जी कोणेविशीं ॥२१॥

दुर्वासांनी श्रीरामांचे भविष्य सांगितले : दुर्वास म्हणे राया दशरथा । ऐसी हे असे पूर्वकथा । तो विष्णु तुझा पुत्र होवोनि तत्वतां[5] । श्रीरामरूपें अवतरला ॥२२॥ तो श्रीलक्ष्मीनारायण । घेतलें श्रीरामाचें नामाभिधान । पाठीचा शेष तो लक्ष्मण । भरत शत्रुघ्न तदंश[6] ॥२३॥ दहा सहस्र वर्षेवरी । राज्य करील अयोध्यानगरीं । तयाची भार्या रावण वैरी । दंडकारण्यी हरील ॥२४॥ पुनरपि वना जाईल । दोघा पुत्रां जन्मवील । अयोध्येचें राज्य करील । सत्य जाण राजेंद्रा ॥२५॥ ऐसें तुझ्या पुत्राचें कथन । दशरथा होईल सत्य जाण । कोणा न सांगावें हें वचन । हृदयीं गुप्त राखावें ॥२६॥ ऐसी सौमित्रा पूर्वकथा । ऋषिमुखीं ऐकिली तत्वतां । ते निरूपली तुज आतां । शोकशमनाकारणें ॥२७॥ ऐसें हे पूर्वकथन । सारथियामुखें ऐकोन । शोक सोडोनि लक्ष्मण । मार्ग क्रमिता पैं झाला ॥२८॥ तंव सूर्य गेला अस्तमानीं । प्राप्त झालीसे रजनी । केशिन्या नामें नगरीसि येऊनी । वस्तीसी तेथें राहिले ॥२९॥ केशिन्येसि क्रमोनि रजनी । प्रभात होतांच दोघे जणीं । रथारूढ होवोनी । अयोध्याभवनीं प्रवेशले ॥३०॥ एका विनवी जनार्दना । पुढील गोड निरूपणा । संवाद होईल श्रीराम लक्ष्मणां । तो सावध श्रोतीं ऐकिजे ॥३१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणसारथिसंवादो नाम एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥५१॥ ओंव्या ॥३१॥

## अध्याय बावन्नावा

॥ श्रीसीतापतये नमः ॥

### हनुमंत नंदिग्रामास गेला

प्रभाते उठोनि सौमित्री । समवेत सुमंत सारथी । रथासहित अयोध्येप्रती । दीन वदन होवोनि आले ॥१॥ भद्रासनीं जनकजामात । प्रधानलोक परिवेष्टित । कैसी सभा दिसे तेथ । हृष्ट पुष्ट जनेंसीं ॥२॥

शब्दार्थ – १. ज्ञानवंता, २. स्थापून, ३. वियोग करविला, ४. खर्ची घालून, ५. खरोखर, ६. विष्णुअंश.

दु:खित लक्ष्मणाने घडलेला वृत्तांत रामांना निवेदन केला : सौमित्र होवोनि परम दीन । मुख कोमाइलें कळाहीन । श्रीरामसमीप येवोन । साष्टांग नमन पैं केलें ॥३॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । अंग कांतपसे थरथरां । अधोमुख होवोनि श्रीरामचंद्रा । सर्व वृत्तांत जाणविला ॥४॥ स्वामीची आज्ञा घेऊन । प्रवेशलों तिघे जण । गंगातीरीं जानकी विसर्जून[1] । पुढील कथन अवधारा ॥५॥ गंगेच्या पैलतीरीं । दु:खित सीता सांडोनी दुरी । आम्ही उतरलों ऐलतीरीं । मग तेथोनि काय देखिलें ॥६॥ जानकी पतिव्रता सुंदरी । रुदन करितां पैलतीरीं । तिचिया शोकाची नवलपरी । सांगता नये श्री[illegible]ना ॥७॥ तदनंतरें मुनिपुत्र । तेथें येवोनि समस्त । घेवोनि जानकीचा वृत्तांत । वाल्मीकासी जाणविलें ॥८॥ वाल्मीकें आश्रमा नेली । बरवेपरी तेथें ठेविली । ऐसी श्रीरामा कथा वर्तली । काय सांगूं राजेंद्रा ॥९॥ श्रीरामा तुम्हीं लोकलज्जेभेण । केलें जानकीचें उपेक्षण[2] । परी ते परम पतिव्रता दारुण । शोक बहुत वनीं केला ॥१०॥ तिचें देखोनि रुदन । माझा निघों पाहे प्राण । परी तुझी कृपा होती म्हणोन । तरीच हे चरण देखिले ॥११॥ सीतेचा शोक ऐकोन । वनींचे पक्षी श्वापदें चारा सांडून । तींही झालीं अति दीन । दु:ख दारुण पैं तिचें ॥१२॥ ऐसी दु:खित ते सीता । वनीं सांडून श्रीरघुनाथा । मी अयोध्येसी आलो तत्वतां । चरण तुझे पहावया ॥१३॥ तुझिया चरणांचेनि दर्शनें । उठे संसाराचें धरणें[3] । अहंममतेचें खत फाटणें वेगीं पावणें परब्रह्म ॥१४॥

लक्ष्मणाचे वैराग्यपर विचार : ऐसिया जी रघुनाथा । जानकीची न करावी चिंता । जें लिहून गेला विधाता । तें सर्वथा न चुकेचि ॥१५॥ भूत भविष्य वर्तमान । तिहींचा तूं साक्षी पूर्ण । ध्येय ध्याता आणि ध्यान । याहूनि भिन्न तूं श्रीरामा ॥१६॥ गृह स्त्री पुत्र धन । यांची आसक्ति ज्ञानियासी नाहीं जाण । भोग भोगून अभोक्तता पूर्ण । वैराग्यीं मन दृढ ज्याचें ॥१७॥ उडणी[4] चढे भिंतीसीं । चढणेंचि होय पतन तिसी । संयोग तोचि वियोगासी । कारण जाण श्रीरामा ॥१८॥ जो प्राणी जन्मा आला । तो गर्भीच जाण मेला । याकारणें साधुमेळा । नि:संग होऊनी रहातसे ॥१९॥ भलतेनें आपुलें करावें हित । न करावें तें वृथा जीवित । आयुष्य जाऊं न द्यावें व्यर्थ । सावचित्त होवोनी ॥२०॥ तस्मात् श्रीरघुपती । जानकीची न करावी खंती । दयाळुवा दयामूर्ती । भक्तपति कृपाळुवा ॥२१॥

लक्ष्मणाची रामांकडून प्रशंसा : ऐकोनि लक्ष्मणाचें वचन । अति संतोषला श्रीरघुनंदन । पुढती काय आपण । बोलता झाला सौमित्रासी ॥२२॥ अगा ये महाबाहो लक्ष्मणा । पुरुषांमाजि पंचानना । ज्ञानियांमध्यें ज्ञाननिधाना । पराक्रमगहना विवेकियां ॥२३॥ तूं वदलासी जें वचन । तें सत्यचि असे प्रमाण । परी माझिया कार्यालागोनि जाण । प्रवर्तलासी ये समयीं ॥२४॥ माझी आज्ञा नुल्लंघितां । वना गेलासि घेवोनि सीता । तेथें सांडून तूं मागुता । अयोध्येसी आलासी ॥२५॥ तुजसारिखा नाहीं आप्त । तुवां केलें माझें हित । चुकविला थोर अनर्थ । लोकापवादाएवढा ॥२६॥ तुझिया भुजांसी कल्याण । चिरकाल होईल जाण । जनापवादभयापासून । मज तुवां गा सोडविलें ॥२७॥ माझिये मना-सारिखा। तूं रहाटलासी महापुरुषा । त्रैलोक्यीं थोर जोडिलें यशा । जनापवादा चुकवोनी ॥२८॥ एका जनार्दना शरण । पुढें नृगभूपतीचें कथन । समूळ सांगेल रघुनंदन । इतिहास पुरातन जुनाट ॥२९॥ ते कथा रसाळ गाढी[5] । श्रोतीं द्यावी तेथें बुडी । तरी पाविजे परपार-थडी । श्रद्धा दृढ धरोनी ॥३०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामलक्ष्मणदर्शनसंवादो नाम द्विपंचाशत्तमोऽध्याय: ॥५२॥ ओंव्या ॥३०॥

---

शब्दार्थ - १. सोडून, २. त्याग, ३. बंधन, ४. पाखिणी, ५. अत्यंत.

# अध्याय त्रेपन्नावा

॥ श्रीमहाविष्णवे नमः ॥

## नृगराजाची कथा

श्रीराम धरणिजाकांत[1] । लक्ष्मणवचनें हर्षयुक्त । होवोनि स्वानंदे डुल्लत । कथा सांगत अनेका ॥१॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणा । तुज गेलें असतां वना । मार्गे चार दिवस राजकारणा । मन नाहीं प्रवर्तलें ॥२॥ तरी आतां नगरीचे जन । बोलावी शेटे महाजन । आणि पुरोहित प्रधान । राजकारणालागूनी ॥३॥ जो देशींचा भूपती । होवोनि न करी राजनीती । तो जाईल अधःपातीं । नृगरायासारिखें होईल ॥४॥ लक्ष्मण म्हणे श्रीरघुनाथा । नृग हा कोण कां अधःपाता । गेला काय कारण सर्वथा । तें मजप्रति सांगिजे ॥५॥ नृग कोण देशींचा भूपती । कोणाचा पुत्र रघुपती । काय चुकला म्हणोनी अधःपातीं । कोणे कर्मे जी गेला ॥६॥ ऐकोनि लक्ष्मणाचें वचन । श्रीराम सच्चिदानंदघन । नृगरायाचें समूळ कथन । सांगता झाला संकळित ॥७॥ ऐकें सौमित्रा पूर्वील कथन । नृगराय धर्मपरायण । ब्राह्मणभक्त करी प्रजापाळण । इक्ष्वाकुनंदन तो नृप ॥८॥ नित्य गायी कोट्यनुकोटी । सवत्स ब्राह्मणां दे जगजेठी । सुवर्णभूषणें शोभती पाठीं । नित्य वांटी गायींतें ॥९॥ पुष्करतीर्थींचा ब्राह्मण । अत्यंत दरिद्री अकिंचन । उंच्छवृत्तीनें[2] वेंची कण । उदरपोषण तेणें करी ॥१०॥

एका ब्राह्मणाला मिळालेली गाय राजाच्या गृही गेली. राजाने ती दुसऱ्या ब्राह्मणाला दान दिली : त्या ब्राह्मणें घेवोनि गोदान । स्वगृहीं नेतां मार्गीं जाण । चुकली धेनु पुनरपि भवन । राजियाचें पैं शिरली ॥११॥ दुसरे दिवशीं राजियानें । सवेंचि केलीं कोटिगोदानें । त्यांमध्यें धेनु आणिक्या ब्राह्मणें । संकल्पोनि घेतली ॥१२॥ ब्राह्मणें घेवोनि धेनूसी । नेली आपल्या नगरासी । तंव येरीकडे पुष्करवासी । स्वधेनूसी पाहता झाला ॥१३॥ म्हणे मज रायानें धेनु दिधली । ते माझ्या प्रारब्धानें नेली । तरी कोणे ठायीं असेल गेली । ती शोधून पाहूं पां ॥१४॥ उपवासी तो द्विजवर । हिंडता झाला नगरें नगर । उपवासी पीडिला एक संवत्सर[3]। धेनूची शुद्धि न लभेचि ॥१५॥ अत्यंत क्लेशी होऊन । कनखलतीर्था आला जाण । तंव ते धेनु विप्रगृहीं देखोन । बोलता झाला द्विजवर ॥१६॥

ती गाय मूळ ब्राह्मणाने ओळखून दुसऱ्याजवळ मागितली : न्याहाळून पाहे धेनूसी । तंव ते ओळखिली निश्चयेसीं । मग साद[4] करोनि[4] तियेसी । शबळे येई म्हणोनियां ॥१७॥ ऐकोनि ब्राह्मणाच्या वचनासी । धेनु लागली पाठीसीं । तंव ते कनखलतीर्थवासी । चरित्र पाहत तियेचें ॥१८॥ विप्राचिया पाठीं लागे । धेनु चालली मार्गे मार्गे । तंव तो येरु बोलिला रागें । कोणाची धेनु नेतोसी ॥१९॥ अगा धेनुचोरा कोठील वासी । माझी गाय चालवोनि नेसी । तुज दंडीन राजसभेसीं । परस्परें कलहासी पेटले ॥२०॥ परस्परें करिती वाद । परस्परे करिती संवाद । एकमेकांसि वर्मांगशब्द । भेदोनियां बोलती ॥२१। ऐसें भांडत भांडत दोघे जण । नृगरायाचें नगरा आले जाण । अति रमले क्षुधेंकरून । राजदर्शन नव्हे सहसा ॥२२॥

---

शब्दार्थ - १. सीतापती, २. उंच्छवृत्ति-शेतांत गळून पडलेल्या धान्यानें उपजीविका, ३. वर्ष, ४. हाक मारून.

राजाचे दोन चार दिवस दर्शन न झाल्यामुळे ब्राह्मण राजाला शाप देतात : दोन चार दिवसपर्यंत । रायाचें दर्शन नव्हे प्राप्त । क्षोभले विप्र शाप देत । झाले नृगभूपतीसी ॥२३॥ क्रोधें अत्यंत तप्त होऊन । शाप देते झाले ब्राह्मण । म्हणती राया तुज कृकळपण[१] । शीघ्रकाळें येईल ॥२४॥ कार्याची उत्कंठा मोठी । म्हणोनि आलों तुझे भेटी । तूं दर्शन नेदिसी शेवटीं । अवश्य सरड पैं होसी ॥२५॥ बहुत सहस्र वर्षे शत । तू कृकळ होसील निश्चित । विवरामाजीं होसील गुप्त । दु:खफळ भोगिसील ॥२६॥ ऐकोनि विप्रांचा शाप । राजा झाला अति संतप्त । मग ब्राह्मण बोलावोनि समीप । प्रार्थिता आपण पैं झाला ॥२७॥ राजा म्हणे ब्राह्मणांसी । धेनूच्या प्रतिनिधी घ्या धेनूसी । ब्राह्मण म्हणती राया परिसेयीं । आणिका धेनूचें कोण काम ॥२८॥

नृगराजाला उ:शाप : मग राजा झाला शरण । स्वामी मज द्यावें उ:शापवचन । मग ते ब्राह्मण गतक्रोध होऊन । वचन बोलत पैं झाले ॥२९॥ यदुकुळीं उत्पन्नभूत । वासुदेवनामें विष्णू साक्षात । जयाचें नाम स्मरतां अंत । महापातकां होतसे ॥३०॥ लीलाविग्रही श्रीनारायण । अवतरेल यदुकुळीं जाण । जयाची कथा परम पावन । शापापासून सोडवील ॥३१॥ वासुदेव परमात्मा आपण । राया सोडवील शापापासून । मग ते दोघेही ब्राह्मण । थोर सुख पावले ॥३२॥ ते धेनु दोघीं जणीं । दिधली आणिका ब्राह्मणालागूनी । पुढें काय वर्तलें चापशरपाणी[२] । सावधान अवधारिजे ॥३३॥ ऐसा रायासि शाप झाला । राजनीतीसी चुकला । याकारणे लक्ष्मणा वहिला । कार्याकारणा न चुकिजे ॥३४॥ राजा राजनीति न करी । एवढीं व्यसनें तयाचे शिरीं । वाजवी सौमित्रा निर्धारीं । यदर्थीं संदेह न धरावा ॥३५॥ एका जनार्दना शरण । पुढें गोड आहे निरूपण । नृगरायाचें कथन । सावधान अवधारा ॥३६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां नृगराजकथनं नाम त्रिपंचाशत्तमोऽध्याय: ॥५३॥ ओंव्या ॥३६॥

## अध्याय चौपन्नावा

॥ श्रीभार्गवजेत्रे नम: ॥

### नृगराजाचे शापसमयीचे वर्तन

ऐसा पवित्र आणि परिकर[३] । रामायणी कथा सार । एकैक श्रवणीं पडतां उत्तर । भवदोषा-वेगळें होईजे ॥१। ऐसें श्रीरामाचें चरित्र । धन्य गाती तयांचें वक्त्र । धन्य ऐकोनि घेती त्यांचे श्रोत्र । परम पवित्र ते नर ॥२॥ श्रीराममुखींची ऐकोनि कथा । बोलता जाहला शक्रारिहंता[४] । पुढें नृगरायाची समूळ कथा । ते मजप्रति सांगिजे ॥३॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणा । पुढें नृगरायाचे आख्याना । मी सांगतों सावधान । श्रवणीं अवधारिजे ॥४॥ येरीकडे नृगराजभूपती । जाणोनि ब्राह्मणाची शापोक्ती । थोर दु:खी झाला चित्तीं । ब्राह्मणाप्रती न चले कांहीं ॥५॥ मंत्री पुरोहित नगरजन । थोर थोर बोलावोनि ब्राह्मण । शिल्पकार[५] गृहकर्ते जाण । तेथें तेही बोलाविले ॥६॥ तयांप्रति नृगभूपती । सांगता झाला विप्रशापोक्ती । यासी कांहीं उपाव न चलती । ऐसें निश्चितीं मज कळलें ॥७॥ कोणे एके काळीं नारद पर्वत । मम दर्शना आले होते येथ । तिहीं भय दाखविलें अद्‌भुत । अध:पात होईल म्हणोनी ॥८॥ नारद पर्वत दोघे जण । मिथ्या नव्हे त्यांचे वचन । पुनरपि अदृश्य होऊन । त्रैलोक्यीं गमन तिहीं केलें ॥९॥

शब्दार्थ - १. सरडेपण, २. धनुष्यबाणधारी लक्ष्मणा, ३. सुंदर, ४. इंद्रजिताला मारणारा (लक्ष्मण), ५. कारागीर.

नृगराजाने सरड्याच्या रूपाने राहण्यासाठी तीन बिळे तयार करवून घेतली : तरी आतां शीघ्रकाळें । शिल्पकारांहातीं विवरें प्रबळें । तीन करावीं शीत उष्ण जळें । पीडा नव्हे जयामध्यें ॥१०॥ शीतकाळीं शीत न वाटे । उष्णकाळीं सीतळ गोमटें । पर्जन्यामाजि जळथेंबुटे । जयामाजि न पडती ॥११॥ ऐसीं विवरें तीं प्रकारची । करावीं शीघ्र तत्काळची । सुंदर शोभा बहुत उंची । रत्नवैडूर्यपाचसंयुक्त ॥१२॥ तयांभोवतें उद्यान । नाना पुष्पांचे परिमळें भरें गगन । नाना प्रकारचे वृक्ष गहन । तयां भोंवते लावावे ॥१३॥ जंवपर्यंत शापमोचन । तंवपर्यंत सरड होवोन । तया वनीं क्रीडा करीन । सावकाश आनंदें ॥१४॥

राजाने पुत्राला राज्य देऊन धर्मोपदेश केला : तदनंतर वसुपुत्र । अत्यंत धार्मिक पवित्र । तया बोलावोनि मस्तकीं छत्र । धरोनि राज्य तया दिधलें ॥१५॥ अगा ये वसु परियेसीं । प्रजा पाळीं स्वधर्मेंसीं । नाहीं तरी गति माझिया ऐसी । पावसील तत्काळ ॥१६॥ प्रत्यक्षासि प्रमाण । मज घडले शापबंधन । तरी तुवां सावध होवोन । सावचित्त असावें ॥१७॥ मज शाप झाला म्हणोन । खेद न करावा आपण । धर्मनीतीचें संरक्षण । सावधान करावें ॥१८॥ माझे विषयींची चिंता । काही न करावी तुवां पुत्रा । सुखदु:खलाभअलाभता । काळाधीन पैं असे ॥१९॥ माझा काळ समीप आला । शीघ्र तुम्ही येथोनि चला । ऐसें म्हणोनि प्रवेशला । गुरुद्वारीं तत्काळ ॥२०॥ ऐसें नृगरायाचें कथन । जयासि होय भक्तिनें श्रवण । तो महापातक दारुण । तयापासून मुक्त होय ॥२१॥ एका जनार्दना शरण । झालें नृगरायाचें आख्यान । पुढें निमीचें[1] आख्यान । श्रीरघुनंदन सांगेल ॥२२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां नृगराजशापसमयो नाम चतु:पंचाशत्तमोऽध्याय: ॥५४॥ ओंव्या ॥२२॥

## अध्याय पंचावन्नावा

॥ श्रीवेदव्यासाय नम: ॥

### निमिराजाला वसिष्ठांचा शाप

मागिलें प्रसंगीं नृगकथन । श्रीरामें लक्ष्मणासि सांगोन । पुढें लक्ष्मण कर जोडून । अभिवंदन करिता झाला ॥१॥ स्वामींनीं कथा सांगतां । तृप्ति नव्हे माझिया चित्ता । आश्चर्य वाटे धरणिजाकांता । पुनरपि कथा ऐकावी ॥२॥ ऐसें लक्ष्मणाचें देखोनि आर्त । पुनरपि जनकजामात । कथा सांगावया उपक्रम[2] करित । त्वरित श्रीराम ॥३॥ पूर्वी राजा इक्ष्वाकुनंदन । तयाचा सुत निमि जाण । अति धर्मिष्ठ प्रजापाळण । बरवेवरी करितसे ॥४॥ तयासि झाले बारा पुत्र । तेही पितयासारखे पवित्र । तयांमध्ये कनिष्ठ गुणवंत । पित्या आवडत बहुसाळ[3] ॥५॥ निमि राजा धर्मपरायण । अति पराक्रमी पुरुषार्थी जाण । अमरपुरीसारिखें पाटन । पुत्राकारणें करूं पाहे ॥६॥ पुत्र वसावयालागून । गौतमाश्रमासमीप नगर जाण । केलें अति शोभायमान । विचित्र वनें भोंवतालीं ॥७॥ नाना सरोवरें निर्मळ पाणी । माजी दोहीं तीरीं कमळिणी । चक्रवाकें हंसहंसिणी । क्रीडताती जळीं सुखें ॥८॥ नगरा नाम जयंतपुर । सुशोभित मनोहर । ते निमीचा राहिला कुमर । इक्ष्वाकुकुळींचा भूपति ॥९॥

---

शब्दार्थ - १. निमिनामक राजाचे, २. आरंभ, ३. अत्यंत.

**अश्वमेधयज्ञासाठी निमीने वसिष्ठादि ऋषींना पाचारण केले :** पितृसंतोषाकारणें । अश्वमेध मांडिला तेणें । पितयाप्रती विचारून । ऋषीश्वरां बोलावूं पाठविलें ॥१०॥ तापसांमाजि मुकुटमणी । ज्ञानियांच्या शिरोरत्नीं । ऐसा वसिष्ठ आत्मज्ञानी । बोलावूनी आणिला ॥११॥ जयाची छाटी आकाशीं । तपतसे तेजोराशी । रविवंशादिराजयांसी । गुरुत्वें पूज्य जो कां होय ॥१२॥ ऐसा वसिष्ठ महामुनी । बोलाविला यागालागोनी । आणि थोर थोर ब्राह्मण सेवोनी । यागाकारणें राहिले ॥१३॥ अत्रि आंगिरस भृगु गौतम । आणिक तपोधन परम । आले जयांचा पराक्रम । तपोबळें आगळा ॥१४॥

**इंद्राच्या यज्ञाची समाप्ती करण्यासाठी म्हणून वसिष्ठ गेल्यावर गौतमांना आचार्यपद देऊन राजाने यज्ञ सुरू केला :** वसिष्ठ म्हणे निमीसी । मज आवंतिलें[1] इंद्रें यागासी । त्याचा याग न्यावया समाप्तीसी । मी जातों राजेंद्रा ॥१५॥ ऐसें वसिष्ठ बोलोन । गेला इंद्राच्या यागालागून । मागें निमीनें गौतमा पाचारून । पूजाविधान मांडिले ॥१६॥ प्रयोग[2] देवोनि गौतमासी । चालतें केलें यागासी । गौतमें बैसोनि हौत्रासी[3] । आरंभ करिता जाहला ॥१७॥ येरीकडे शचीपतियाग संपवून । सवेचि वसिष्ठ तपोधन । निमीच्या यागासि येऊन । गौतम होत्रीं देखिला ॥१८॥ गौतमें करितां हौत्रासी । वसिष्ठ क्रोधला मानसीं । मग म्हणे निमिरायासि । भला झालासी सूर्यवंशीं ॥१९॥

**अपमान झाला म्हणून वसिष्ठांचा राजाला शाप :** आम्हां करोनि अपमान । आम्ही नसतां याग आरंभून । गौतमासी हौत्र देऊन । भला याग आरंभिला ॥२०॥ हिमवंताचें पार्श्वभागीं[4] जाण । नूतन नगरासमीप उद्यान । पंच सहस्र वर्षे यज्ञ । करित असतां तुम्हीं वनीं ॥२१॥ मी सूर्यवंशींचा गुरू । माझा करोनि अनादरू । तुम्हीं करितसां अध्वरू । येथें विघ्न होईल ॥२२॥ ऐसें वसिष्ठें कोपेसीं । शापिलें ते समयीं रायासी । निमि तूं वायुरूप होसी । कित्येक काळपर्यंत ॥२३॥ ऋषीचा शाप झाला जाणोन । राजा बाहेर येवोन । वसिष्ठासि करोनि नमन । बोलता झाला दीनवाणी ॥२४॥ अहो जी स्वामी वसिष्ठमुनी । तुम्ही तापसांमाजि मुकट-मणी । मी होतों निद्रास्थानीं । वृथा शाप दिधला ॥२५॥ यमाचा जैसा दंड । तैसा तुमचा शाप प्रचंड । अन्याय नसतां मजला दृढ । वृथा शाप दीधला ॥२६॥

**राजानेही रागाने वसिष्ठांना शाप दिला :** निमिराजा कोपेंकरून । वसिष्ठासि शापिता झाला जाण । म्हणे महाऋषि अचेतन । देह धरिसी वसिष्ठा ॥२७॥ परस्परें शाप झाले । ऋषीनें रायासि शापिलें । नृपतीनें ऋषीस कठिण बोलें । शाप दिधला तत्काळ ॥२८॥ दोघे झाले शापाभिभूत । परस्परें झाले विचारित । तंव वसिष्ठें विचारोनि जेथें विधि[5] तात[6] । आला तेथें सत्वरी ॥२९॥ विधात्यासि करोनि नमन । वसिष्ठ बोल दीनवदन । मज निमीनें शापोन । थोर दुःख दिधलें ॥३०॥ आतां या शापापासून । सुटें ऐसी कृपा करून । मज द्यावें जीवदान । सत्यलोकनायका चतुरानना ॥३१॥ वसिष्ठाचें ऐकोनि वचन । म्हणता झाला चतुरानन । वसिष्ठा तुवां आपण । मित्रावरुणापासीं जावें ॥३२॥ तो मित्रावरुण महाऋषी । तपें अत्यंत तपोराशी । तेथें जावें शीघ्रकाळेंसीं । विलंब न करीं मानसपुत्रा ॥३३॥ तयाचे तपेंकरून । तूं अयोनि जन्म धरिसी जाण । पुढती पावसी माझें स्थान । सत्य जाण वसिष्ठा ॥३४॥

**ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणे वसिष्ठ वरुणाच्या शरीरांत प्रविष्ट झाले :** ऐसा वसिष्ठ महाऋषी । धरोनि वायूच्या देहासी । आला मित्रावरुणापासीं । वरुणदेहीं प्रवेशला ॥३५॥ शापेंकरोन

---

शब्दार्थ - १. बोलाविले, २. यज्ञाधिकार, ३. यज्ञासी, ४. जवळ, ५. ब्रह्मदेव, ६. बाप.

वसिष्ठमुनी । वरुणहृदयीं प्रवेशूनी । तंव येरीकडे उर्वशी समुद्रनंदीनी । वरुणाश्रमीं पैं आली ॥३६॥ वरुणें देखोनि उर्वशीसी । अत्यंत लावण्याची राशी । मदनें[1] भ्रांत[2] होवोनि ऋषी । तियेप्रति बोलता झाला ॥३७॥ अवो भद्रे चंद्रानने । मज पीडिलें थोर मदनें । तुवां मज आतां देणें । रति ये समयीं ॥३८॥ उर्वशी म्हणे वरुणाशी । मित्रें[3] मज वरिलें परिसा ऋषी । तयासि सांडोनि तुम्हांपासीं । समतां नये मज स्वामी ॥३९॥

**वसिष्ठरूपी वरुणाने कुंभांत आपले वीर्याचा निक्षेप केला :** मग वरुणें कुंभाप्रती । वीर्य निक्षेपिलें[3] निश्चितीं । तूं येविषयीं चिंता चित्तीं । धरूं नको देवांगने ॥४०॥ ऐसें म्हणोनियां ऋषी । विचारिता झाला उर्वशीसी । वीर्य निक्षेपोनि घटीं तिसी । आज्ञा दिधली जावया ॥४१॥ तेथें प्रेमेंकरून । झालें जें अमोघ रेतःस्खलन । तें कुंभीं भरून ठेवून । गेली आपण उर्वशी ॥४२॥ अंगीं झाली भयभीत । शरीर खळचळां कांपत । मित्रापासीं येवोनि तेथ । नमस्कार करिती झाली ॥४३॥

**उर्वशीला सूर्याचा शाप :** मित्र म्हणे उर्वशीसी । म्यां वरिलें असतां वरुणापासीं । गेलीस केलें व्यभिचारासी । अति निंद्य कर्मातें ॥४४॥ तुवां निंद्य कर्म आचरोन । राहसी मजपासीं येवोन । पापिष्ठ तूं मानवीजनन[4] । पावसील शीघ्रकाळें ॥४५॥ मानवी पुरुष तुजसीं रती । करील उर्वशी जाण निश्चितीं । बुधाचा पुरुरवा नंदन तयाप्रती । साच[5] संग करशील ॥४५॥ कित्येक काळ काशिराजघरीं । गृहिणी होवोनि विचरसी सुंदरी । ऐसी तूं मृत्युलोका- माझारी । किंचित दिवस राहसील ॥४७॥ एका जनार्दना शरण । वसिष्ठ उर्वशीआख्यान । पुढें गोड निरूपण । जनार्दन वदविता ॥४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां निमिनृपवसिष्ठशापोक्ति नाम पंचपंचाशत्तमोऽध्यायः ॥५५॥ ओंव्या ॥४८॥

## अध्याय छप्पन्नावा

॥ श्रीकमलापतये नमः ॥

### ययातीची कथा

वसिष्ठनिमीचें कथन । ऐकोनियां लक्ष्मण । पुढें कैसे शापमोचन । झालें जी रघुनंदना ॥१॥ श्रीराम म्हणे गा सौमित्रा । पुढील अपूर्व रसाळ कथा । ते सांगेन सावधान श्रोता । दृढ चित्ता देइजे ॥२॥ वसिष्ठनिमींचें आख्यान । इतिहास पुरातन । वरुणवीर्य अति दारुण । घटामाजी निक्षेपिलें ॥३॥ दिवसेंदिवस वाढोन । तयाचा झाला मैत्रावरुण । तयासि अगस्ति ऐसें अभिधान । कुंभोद्भव म्हणती पंडित ॥४॥ आतां निमिरायाची स्थिती । सावधान ऐकें ऊर्मिलापती । शाप झाला कैसा मागुती । उःशापातें पावला ॥५॥ वसिष्ठाचे शापेंकरून । निमीनें देह न सांडितां जाण । आणिक देहीं प्रवेशोन । नयनीं प्राण ठेविले ॥६॥ वंशाचें करावया हित । काय करी प्रतापवंत । यज्ञ करोनि समस्त । सकळ देवां पूजिलें ॥७॥ षोडशोपचारीं पूजा । वस्त्रें नानापरींचीं देवोनि वोजा । ब्राह्मण तोषले महाराजा । आशीर्वाद देते झाले ॥८॥ समस्त ब्राह्मण मिळोन । रायासि झाले सुप्रसन्न । म्हणती मागसी तें देऊं दान । सत्य जाण राजेंद्रा ॥९॥

**देवांचे डोळ्यांचे पाते न हालण्याचे कारण :** ऐसें देवद्विजांचे वचन । ऐकोनि संतोषला राजा

---

शब्दार्थ - १. कामाने पीडित, २. सूर्याने, ३. घातले, ४. मनुष्यजन्म, ५. खरोखर.

जाण । म्हणे प्रसन्न झालेति मी नेत्रीं राहीन । तुम्हां समस्तां जनाचें ॥१०॥ देव म्हणती महा बरवें । तुवां नेत्रीं असावें । वायुरूप होवोनि विचरावें । दोहीं डोळ्यांभीतरी ॥११॥ समस्त देवांचे नेत्रांअंतीं । राहिला तो निमिभूपती । तेणें पातिया पातीं न हालती । हेचि खूण तयांची ॥१२॥ यज्ञींचे देव स्वर्गाप्रती । सुखस्वानंदें वर देवोनि जाती । मागें ऋषीश्वर काय स्थिती । करिते झाले राजदेहातें ॥१३॥ निमिरायाचें देहमथन । करिते झाले ऋषिब्राह्मण । यज्ञींच्या अरणी[1] आणोन । आयास थोर मांडिला ॥१४॥ मथितां रायाचें शरीर । झालें मिथिलानामें नगर । तदंशें जन्मला जो नृपवर । तयासि जनक बोलिजे ॥१५॥ पूर्वी देही नव्हता । म्हणोनि विदेही तत्वतां[2] । ऐसी लक्ष्मणा झाली कथा । मिथिलेशा जनकाची ॥१६॥ ऐसें रघुनाथाचें शब्दरत्न । ऐकोनि सुमित्रानंदन । थोर विस्मय पावोन । सुखसंपन्न पैं झाला ॥१७॥ लक्ष्मण म्हणे श्रीरामासी । भार्गवजेत्या[3] कथा सुरासी । ऐकोनि आश्चर्य वाटे मानसीं । पुनरपि श्रवण करावें ॥१८॥ राजा ऋषि दोघे अशांत । परस्परें शापून पावले अंत । पुनरपि तयांचें जन्म अद्भुत । अति विपरीत पैं झालें ॥१९॥ पुढील कथेचें अनुसंधान । तें मज सांगावें कृपा करून । लक्ष्मणाचें आर्त देखोन । रघुनंदन बोलता झाला ॥२०॥

ययातीची कथा : पूर्वी नहुषराजा सूर्यवंशी । तयाचा पुत्र ययाति नामेंसीं । प्रजापाळणीं संतोष ज्यासी । गोब्राह्मणांसी कृपा करित ॥२१॥ दोघी स्त्रिया त्यालागून । अति प्रसिद्धा रूपें गुणेंकरून । तयांचीं नामें सौमित्रा जाण । सावकाशीं अवधारीं ॥२२॥ शर्मिष्ठा नामें ज्येष्ठ पत्नी । वृषपर्व्याची नंदिनी[4] । कनिष्ठ जे देवयानी । दैत्यगुरूची कन्या होय ॥२३॥ ज्येष्ठ शर्मिष्ठेसि झाला पुत्र । पूरू नामें सुंदर गुणवंत । देवयानीस एक सुत । यदुनामें पैं झाला ॥२४॥ दोघी असती सम्त्सर । ययातीस शर्मिष्ठा प्रियकर । तिचे दोघे आवडती कुमर । देवयानी नावडे पुत्रेंसीं ॥२५॥ ऐसे यदूनें जाणोन । मातेचा केला अपमान । देवयानीप्रति कर जोडून । यदुपुत्र बोलता झाला ॥२६॥ म्हणे माते अवधारीं । पिता तुझा माझा अपमान करी । तरी मी वांचेंना संसारीं । जीव देईन आपुला ॥२७॥ मी करीन विषपान । अथवा अग्निकाष्ठें भक्षीन । सर्वथा प्राण सांडीन । हें दुःख माझेनि न देखवे ॥२८॥

देवयानीने बापाकडे तक्रार केली : ऐकोनि पुत्राचें वचन । देवयानी झाली उद्विग्न । तैसीच पितृगृहा येऊन । काय करिती पैं झाली ॥२९॥ ते दैत्यगुरूची नंदिनी । प्रवेशली पितृभवनीं । संमुख पित्यासी देखोनी । साष्टांग नमन पैं केलें ॥३०॥ अति दीन चिंतातुर । म्लानवदन कृशशरीर । ऐसें देखोनियां शुक्र । कन्येप्रति बोलिला ॥३१॥ आजि तुझें मुख कोमाइलें । चिंतेचे भरितें हृदयीं दाटलें । शरीर अत्यंत कृश झालें । काय कारणें कन्यके ॥३२॥ कोणें केला अपमान । तें सांगावें मज विस्तारोन । ऐकोनि पितयाचें वचन । देवयानी बोलिली ॥३३॥ अहो जी ताता अवधारीं । माझा अपमान भ्रतार करी । मज हेळसून[5] आणिके घरीं । पुत्रासहित दवडिलें ॥३४॥ माझा न करीच अंगीकार । सवतीही चालवी मत्सर । ऐसें दुःख देवोनि अपार । आम्हां बाहेर घातलें ॥३५॥

शुक्राचार्याने ययातीस वृद्ध होशील असा शाप दिला : ऐकोनि कन्येचें वचन । भार्गव[6] झाला क्रोधायमान । म्हणे माझ्या कन्येचा अपमान । करोनि शर्मिष्ठा भोगित ॥३६॥ तेचि क्षणीं दैत्यगुरू । कोपें कोपला जैसा रुद्रू[7] । म्हणे सृष्टीचा संहार करूं । कीं समुद्र शोषूं सातही ॥३७॥ क्रोधें थरथरां कांपत । जेथें होता जामात । तेथें शुक्र येवोनि त्वरित । शाप तत्काळ दीधला

शब्दार्थ - १. यज्ञांत अग्नी पाडावयाचें पात्रविशेष, २. खरोखर, ३. रामचंद्रा, ४. कन्या, ५. उपेक्षा करून, ६. भृगुकुलोत्पन्न शुक्र, ७. शंकर.

॥३८॥ अगा ययाति महावीरा । राज्यमदें उन्मत्त झालासि खरा । विषयबुद्धीं भ्रमलासी पुरा । तारुण्येंकरोनि मातलासी ॥३९॥ नेणसी तूं आपपर । न करसी स्वहिताचा विचार । ऐसा तूं पावसी जरा शीघ्र । आर्जिचिये काळीं ॥४०॥ माझ्या कन्येचा करोनि अपमान । ज्येष्ठस्त्रीभोगीं आसक्त मन । तुझ्या तारुण्या होईल हान[1] । सत्य जाण ये काळीं ॥४१॥ ऐसें शापोनि जामातासी । शुक्र निघाला स्वभवनासीं । आश्वासोनिं दौहित्रासी[2] । तये काळीं लक्ष्मणा ॥४२॥ रावणारीचें ऐसें वचन । ऐकोनि सुमित्रानंदन । म्हणे स्वामी भार्गवें शापून । निजधामा गमन केलें ॥४३॥ तदनंतरें श्रीरघुपती । शाप पावोनि ययाती । पुढें काय करिता झाला तें मजप्रती । सविस्तरें सांगावें ॥४४॥ श्रीराम म्हणे गा लक्ष्मण । पुढील ऐक पां कथन । ययाति जरा पावोन । थोर कष्ट पावला ॥४५॥

यदूला वृद्धत्व स्वीकारण्याची बापाची विनंती. त्याचा नकार : पाचोरोनि पुत्रा यदूसी । ययाति म्हणे पुत्रा परियेसीं । जरेनें मी होतों बहुत क्लेशी । ते जरा तूं अंगीकारीं ॥४६॥ मजसंतोषार्थ हे जरा । तूं अंगीकारीं गा कुमरा । धर्मिष्ठ सज्ञान चतुरा । यया कार्या शीघ्र करावें ॥४७॥ जरेकरोनि जर्जरीभूत । परी माझें भोगीं आसक्त चित्त । याकारणें तूं गुणवंत । अवश्य जरा अंगीकारीं ॥४८॥ ययातीचें करुणावचन । ऐकोनि यदु कोपायमान । काय बोलिला तें सावधान । श्रोतीं सादरें श्रवण कीजे ॥४९॥ राया तुझ्या आवडता पूरू । तया देईं जराभारु । तयासि यदर्थी अधिककारु । ज्येष्ठ म्हणोनि राजेंद्रा ॥५०॥ जयावीण न करिसी भोजन । जयावीण न करिसी उदकपान । तो जरा अंगीकारील जाण । जयासि राज्याचा अधिकार ॥५१॥ विशेषही आवडता । प्राणाहूनि पढियंता । तयासि जरा देइजे ताता । कांही विचारा करूं नको ॥५२॥ मी कनिष्ठ नावडता पुत्र । मज अधिकार नाहीं येथ । ऐकोनि यदूचा वचनार्थ । थोर क्रोध पावला ॥५३॥

पुरूने ययातीच्या विनंतीचा स्वीकार केला : मग पाचारोनि ज्येष्ठ पुत्र । पूरूनामें गुणवंत । तयासि राजा बोलत । सावचित्त करोनी ॥५४॥ अगा पूरो महाबाहो वीरा । मजप्रीत्यर्थ अंगीकारीं जरा[3] । तिचेनि धाकें सुरवरां । थोर हडबड होतसे ॥५५॥ माझें विषयभोगीं मन आसक्त । वियोग होतां दुःखी होत । याकारणें तुवां त्वरित । जरा माझी अंगीकारावी ॥५६॥ ऐकोनि पितयाचें वचन । कर जोडोन पूरू करी विनवण । म्हणे स्वामी भाग्य गहन । मजवरी तुष्टलेती ॥५७॥ म्हणे आजि मी धन्य भाग्याचा । अवश्य करीन अंगीकार जरेचा । पूरूवचन ऐकोनि पुत्र[4]नहुषाचा[4] । काय करिता पैं झाला ॥५८॥ आपुले शरीराची जरा । पुत्रास दिधली ते अवसरां । आपण नूतन झाला सौमित्रा । विषयभोगाकारणें ॥५९॥ नूतन झाला राजा ययाती । नानापरींचे याग[5] विप्रांहातीं । करवीतसे तो नृपती । स्वधर्मे पाळी क्षितीतें ॥६०॥ राज्य करी स्वधर्मता । नगरीं नाहीं अधर्मवार्ता । ऐशीं सहस्र वर्षे क्रमिलीं असतां । पुढें अनुताप उपजला ॥६१॥

पुनः ययातीने पुरूकडे 'जरा' मागितली : विषयीं उदास झालें चित्त । मग पाचारोनि पूरू सुत । तयासि बोले नृपनाथ । माझी जरा मज देइजे ॥६२॥ अगा ये पुत्रा गुणवंता । माझी जरा मज दीजे आतां । ते मी अंगीकारीन हितार्था । आपुलियाकारणें ॥६३॥ विषयीं उदास झालें चित्त । माझी जरा मज दीजे शीघ्रवत । पितृवचन ऐकोनी पूरू सुत । जरा जनकास देता झाला ॥६४॥

---

**शब्दार्थ** – १. नाश, २. नातवास, ३. म्हातारपण, ४. नहुषपुत्र ययाती, ५. यज्ञ.

यदूला शाप : राज अति संतोषला । पुत्रासि राज्याभिषेक केला । कनिष्ठपुत्रा शाप दिधला । देवयानीच्या आत्मजा ॥६५॥ माझें वचन अपमानोन । तूं राक्षसी क्षत्रिय होसी दुर्जन । प्रजेचें तुझेनि पाळण । सर्वथा नव्हे पापिष्ठा ॥६६॥ मी तुझा पिता गुरुसमान । तुवां माझा केला अपमान । तुझे पोटीं यातुधान । कर्कश दारुण जन्मती ॥६७॥ ऐसा कनिष्ठ पुत्रा शाप देवोन । ज्येष्ठासी राज्यीं स्थापून । आपण तपश्चर्येलागीं जाण । वनप्रयाण पैं केलें ॥६८॥ वना जावोनी राजऋषी । सर्वेचि त्यजोनि देहासी । विमानीं आरूढोनी स्वर्गासी । जाता झाला ययाति ॥६९॥ मागे पुरू धर्मनीतीं । प्रजापाळणीं परम प्रीती । प्रतिष्ठान नामे नगराप्रती । राज्य करिता पैं झाला ॥७०॥ वाराणसीचे[१] पूर्वदिशे । प्रतिष्ठान नामें नगर असे । तेथील राज्य सुखसंतोषें । करिता झाला ययातिपुत्र ॥७१॥ पुढें कनिष्ठ यदूचें कथन । जो भार्गवात्मजेचा[२] नंदन । पितयाचे शापेंकरून । अति चिंतातुर पैं झाला ॥७२॥ शाप झाला दौहित्रासी[३] । ऐसें ऋषीनें जाणोनी मानसीं । शापापासोनि नातवासी । क्षणमात्रें मुक्त केलें ॥७३॥ क्रौंचवनादि नाना वनीं । यदु क्रीडा करी स्वइच्छेंकरोनी । पुढें काय वर्तलें तें वाल्मीकमुनी । कथा अनुपम्य सांगेल ॥७४॥ यालागीं लक्ष्मणा परम । राजानें न सांडावा राजधर्म । न करितां नृगा शाप दारुण परम । ऋषिशापें सरड झाला ॥७५॥ एका जनार्दना शरण । ययातीस झालें स्वर्गगमन । पूरूसि देवोनि राज्यासन । पुढें श्रवण करावें ॥७६॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां ययातिकथनं नाम षट्पंचाशत्तमोऽध्यायः ॥५६॥ ओंव्या ॥७६॥

## अध्याय सत्तावन्नावा

॥ श्रीसीताकांताय नमः ॥

### लवणासुराचे आख्यान

श्रीरामचंद्र राजीवनयन । कथा सांगतां लक्ष्मणा । थोर आश्चर्य पावला मना । ब्रह्मानंदें डुल्लत ॥१॥ आधींच कथा रामायणी । जे कां वदला वाल्मीक मुनी । सुरस आणि जगतारिणी । प्रवेशतां श्रवणीं भवदोष खंडी ॥२॥ ऐसे श्रीरामलक्ष्मण । चर्चा करितां निशी क्रमोन । प्रभात होय रविकिरण । सर्वत्र अवनीं प्रगटले ॥३॥ दोघे बंधु श्रीरामलक्ष्मण । करोनियां संध्यास्नान । भद्रासनीं येवोनि जाण । राजनीती करिते झाले ॥४॥

ऋषिसमुदाय श्रीरामांच्या दर्शनार्थ आला : तंव सुमंत प्रधान आला । श्रीरामा नमस्कार केला । म्हणे स्वामी ऋषींचा मेळा । द्वारी उभा दर्शनार्थी ॥५॥ यमुनातीरींचे ऋषीश्वर । भार्गवच्यवनादि थोर थोर । तुमचे भेटीलागीं द्वार । धरोनि उभे असती पैं ॥६॥ ऐकोनि प्रधानाची मात । काय बोलिला काकुत्स्थ[४] । वेगीं पाचारीं गा त्वरित । भार्गवच्यवनादि ऋषींसी ॥७॥ श्रीरामाज्ञा वंदोनि शिरीं । मग त्यां सुमंतें झडकरी । द्वारा येवोनि विनीतोत्तरीं । ऋषीश्वरांप्रति प्राथिलें ॥८॥ सुमंत म्हणे ऋषीश्वर हो । दर्शनाकारणें जानकीनाहो । उद्यत बैसलासे पहा हो । जैसा चंद्रालागीं चकोर ॥९॥ तरी प्रवेशावें राजभवन । भेटीस तिष्ठे रघुनंदन । ऐसें ऐकोनि सुमंत-वचन । ऋषी भवनीं प्रवेशले ॥१०॥ ऋषींस देखोनि रघुनंदन । करोनियां अभिवंदन । नाना-परींचीं आसनें देवोन । सभेमध्ये बैसविले ॥११॥ श्रीराम म्हणे जी ऋषी । तुमचें दर्शनें अभीष्ट[५]

शब्दार्थ - १. काशीचे, २. देवयानीचा, ३. नातवाला, ४. श्रीराम, ५. कल्याण.

आम्हांसी । तरी कोण कार्याचे उद्देशीं । तुम्हीं आगमन पैं केलें ॥१२॥ ऐकोनियां श्रीरामवचन । पूर्णकलशीं तोय[1] पूर्ण । आणि फळे मुळे तूर्ण[2] । श्रीरामासी समर्पिली ॥१३॥ ऋषींची देखोन अति प्रीती । सर्व अंगीकारूनी धरणिजापती । पुनरपि म्हणे कोण कार्यार्थी । तुमचें आगमन पैं झालें ॥१४॥ मी तुमचा आज्ञाधर । आणि सेवकाचा किंकर । तुमच्या कार्यालागीं अवतार । सूर्यवंशीं धरिलासे ॥१५॥ राज्य आणि सकळ जीवित । हें वेंचीन प्रियकार्यार्थ । माझें वचन मानावें सत्य । कायावाचामानसें ॥१६॥ कोण उत्कंठा असे चित्तीं । तू मज सांगा जी निश्चितीं । मी प्रवर्तेन त्या अर्थी । तुमचे सेवेलागोनी ॥१७॥

ऋषींकडून श्रीरामांची स्तुती : श्रीरामाचे ऐकोनि वचन । भला भला गा धन्य धन्य । तूं सूर्यवंशीं शिखारत्न[3] । शिवहृदयींचें ध्यान तूंचि पैं ॥१८॥ तुज देखोनि श्रीरामा । थोर सुख झाले आम्हां । जैसा चकोर चंद्रम्या । तैसा तूं आम्हां कृपाळु ॥१९॥ बहुत राजे पृथ्वीपती । नानापरींचे धरणीवरी असती । तयांमध्ये तूं श्रेष्ठ श्रीरघुपती । अगाध कीर्ती पैं तुझी ॥२०॥ तूं त्रैलोक्याचा ईश्वर । ब्रह्मा तुज निजकुमर । फेडावया भूमिभार । अवतरलासी श्रीरामा ॥२१॥ तूं जगाचा ईश्वर । सुरकार्या लागीं अवतार । धरोनि फेडिसी धराभार। दशरथकुमर होवोनी ॥२२॥ येथें संदेह नाहीं श्रीरघुपती । कार्य करिसी हें निश्चितीं । ऋषींचें कार्य निरसावयार्थी । तुज असे अधिकार ॥२३॥

कार्य कोणते हे समजून घेतल्याशिवाय होकार देऊ नये : ऋषि म्हणती श्रीरामा जाण । कोणे कार्यालागीं ब्राह्मण । आले असती हें विचारून । मग करीन ऐसें वदावें ॥२४॥ न जाणतां कार्याची स्थिती । न म्हणावे करीन श्रीरघुपती । ऐसी असे राजनीती । विनंती यदर्थी आम्हीं केली ॥२५॥ ऋषींमध्यें भार्गवमुनी । जो अत्यंत सधर्म अनुष्ठानीं । तो ऋषिभय श्रीरामा-लागोनी । सांगतां झाला ते काळीं ॥२६॥

मधुदैत्याची कथा : पूर्वी कृतयुगीं जाण । गोळपुत्र ज्येष्ठ मधु नामाभिधान । दैत्यांमध्ये परम पावन । धर्मनिष्ठ अत्यंत ॥२७॥ गायीब्राह्मणां हितकारी । परम उदार पृथ्वीवरी । वीर्यसंपन्न दुष्टां संहारी । कृपा करी द्विजदेवां ॥२८॥ ऐसा स्वधर्मनिष्ठ गोळनंदन । मधुनामें प्रसिद्ध जाण । तयासि रुद्र झाला प्रसन्न । अद्भुत वरदान पैं दिधलें ॥२९॥ निजशूळापासोनि जो निश्चित । निर्माण करी शैलजाकांत । परम प्रीतीने रुद्रें तेथ । तो शूळ तयासि दिधला ॥३०॥ अगा मधु तुझी उत्तम भक्ती । आणि सर्व जीवांसिं प्रिय निश्चितीं । ऐसें जाणोनि मी उमापती । प्रसाद शूळ दिधला ॥३१॥ जंव स्वधर्मे पाळिसी जन । तंवपर्यंत शूळ राहेल जाण । जेव्हां ऋषींसी करिसी विरुद्धपण । तेव्हां शूळ जाईल निजस्थानासी ॥३२॥ या शूळानें दैत्यवधार्थी । तूं जय पावसी निश्चितीं । जेव्हां तुझी फिरेल मती । तेव्हां शूळ घाता प्रवर्तेल तुझ्या ॥३३॥ ऐसे रुद्रवर लाहोन । गोळपुत्रें प्रणिपात करून । पुनरपि महादेवाप्रति वचन । बोलता झाला ते काळीं ॥३४॥ अहो जी महेशा पार्वतीपती । माझ्या वंशा हो शूळप्राप्ती । तुम्ही प्रेमसिंधु सर्वांगीं विभूती । माथां जटाजूट[4] शोभती ॥३५॥ चंद्रशेखर त्रिपुरदहन । कामांतक वृषभवाहन । पिनाकपाणि त्रिलोचन । पंचवदन परमेश्वर ॥३६॥ ऐसी तया मधूची स्तुती । ऐकोनियां पशुपती । पुनरपि वदे दैत्याप्रती । जें जें असेल चित्तीं तें पावसील मत्प्रसादें ॥३७॥ माझिये कृपेनें मधु । वेगीं भोगी तूं सुख आनंदु । तुझिया पुत्रा शूळ शुद्धु । प्राप्त होईल हा जाण ॥३८॥ ऐसा मधु वर लाहोन[5] । प्रेमें झाला सुखसंपन्न ।

शब्दार्थ - १. उदक, २. त्वरेनें, ३. चूडामणि, श्रेष्ठ, ४. जटासमूह, ५. मिळवून.

पुढील श्रीरामा निरूपण । भार्गव[1] जाण सांगता झाला ॥३९॥ ऐकें श्रीरामा धरणिजापती । मधूची कुंभीनसीनामें सती । विश्वावसूची दुहिता निश्चितीं । सुंदर गुणवंत पतिव्रता ॥४०॥ तियेच्या उदरीं लवणासुर । जन्मला अत्यंत पराक्रमी शूर । बाळपणापासोनि कर्मे घोर । पापाचार करितसे ॥४१॥ पुत्र दुष्टात्मा देखोन । मधूसि चिंता अति गहन । म्हणे हा पापिष्ठ दारुण । वेगीं निधन[2] पावो पैं ॥४२॥ पुत्रातें म्हणे मधु दैत्य । तूं विचरें वरुणालय जेथ । हा शूळ घेवोनियां त्वरित । मजपासोनि पैं जावें ॥४३॥ या शूळाचा महिमा अगाध । देवां दैत्यांसि करितां युद्ध । जवळी शूळ असतां न पाविजे खेद । परी देवां ऋषींस विरुद्ध करूं नये सर्वथा ॥४४॥ तेणें ऐकोनि पित्याचें वचन । शूळ करीं घेवोन जाण । विचरतां दुःख दारुण । देता झाला ऋषींतें ॥४५॥ तयाचे भयें श्रीरामा । येथवरी येणें झालें आम्हां । तुजवाचोनि तो दुष्टात्मा । वधिला न जाय इतरांसी ॥४६॥ अनेक पृथ्वीपति असती । तयांचेनि लवणासुर दुष्टमती । वधिला न जाय श्रीरघुपती । आमची भयनिवृत्ती तुवां कीजे ॥४७॥ रावणाऐसा दुराचारी । तुवां वधिला सहपरिवारीं । तुजपुढें लवण मशकापरी । तुझें दृष्टीनें नुरेल ॥४८॥ एका जनार्दना शरण । पुढें लवणासुरी वधावयालागून । सहपरिवारीं जाईल शत्रुघ्न । सावधान अवधारा ॥४९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां लवणासुराख्यानं नाम सप्तपंचाशत्तमोऽध्यायः ॥५७॥ ओंव्या ॥४९॥

## अध्याय अठ्ठावन्नावा

॥ श्रीजानकीकांताय नमः ॥

### शत्रुघ्नाला राज्याभिषेक

श्रीराम म्हणे भार्गवासी । मधूचा पुत्र लवणासुर नामेंसीं । कोण कर्म करी कोठें क्रीडेसीं । कोणें देशीं विचरतसे ॥१॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । आनंदयुक्त समस्त जन । तयांत भार्गव समूळ कथन । सांगता होय ते समयीं ॥२॥

**सर्व प्राण्यांना भक्षण करणारा लवणासुर : लवणासुराची समूळ विवंचना** । ऐकें गां पद्माक्षीरमणा[3] । मधुकुळीं जन्मोनि जाणा । नाना प्राणी भक्षितो ॥३॥ विशेषेंकरोनि तापस । लवणासुर भक्षितो सावकाश । रुद्रकर्म[4] तोचि आचार त्यास । नित्य क्रीडेसी मधुवचन ॥४॥ सहस्रें सहस्र मारोनी । व्याघ्रमृगादिक प्राणी । मानवें भक्षोनि आव्हानी[5] । कर्मक्रिया करितसे ॥५॥ जैसा प्रळयकाळींचा काळ । भक्षितसे जीवजाळ । तैसा लवणासुर केवळ । प्राणिमात्रां अंतक ॥६॥ ऐसें ऋषीचें मधुर वचन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । म्हणे स्वामी तपोधन । बहुत दुःख पावले ॥७॥ लवणासुरासी मारीन । मी तंव न लागतां क्षण । तुमचें दुःख हृदयींचे दारुण । निर्दळीन निमेषें एका ॥८॥ ऐसी प्रतीज्ञा रामें करून । ऋषींसमवेत बंधुजन । बैसले असतां सावधान । सीतारमण बोलता झाला ॥९॥

**रामांची बंधूंना लवणासुराला मारण्याविषयी विचारणा** : कोण मारील लवणासुरासी । ऐसे श्रीराम बोले बंधूंसी । कोणाचा वाटा ते मजपासीं । शीघ्रवत सांगावें ॥१०॥ भरत आणि शत्रुघ्न । राम लक्ष्मण आणि तपोधन। त्यांत श्रीराम ऐसें बोलिल्यावरून । भरत आपण

शब्दार्थ - १. च्यवनभार्गवऋषी, २. मरण, ३. सीतापते रामा, ४. क्रूर कर्म, ५. देवतांस उद्देशून यज्ञ करी.

विनविता झाला ॥११॥ ऐकें नरवीर चूडामणी । ममांश तो दैत्य मधुवनीं । जेणें भक्षिले तापस अनेक प्राणी । तयाचे निर्दळणीं मी असें ॥१२॥ ऐसें भरताचें वचन । ऐकोनी शत्रुघ्न टाकोनि आसन । श्रीरामासंमुख उभा राहोन । विनंति करिता पैं झाला ॥१३॥ तो शत्रुघ्न म्हणाल कैसा । शत्रुनिर्दळणीं सिंह जैसा । जयाचे धाकें वैरिमानसा । धडका[1] लागे दारुण ॥१४॥

लवणासुराला ठार मारण्याची शत्रुघ्नाची तयारी : ऐसा शत्रुघ्न वीरपंचानन । बोलता झाला सभा लक्षोन । म्हणे लवणासुर माझा वांटा जाण । तो मज स्वामी देइजे ॥१५॥ भरतें शून्य नगरी । मागें रक्षिली अयोध्यापुरी । आणि तप करोनि भारी । थोर श्रम पावला ॥१६॥ चीरकृष्णाजिनधर[2] । मस्तकीं वाहे जटाभार । करून वनफळांचा आहार । भूमिशयन येणें केलें ॥१७॥ चतुर्दश वर्षेपर्यंत । नंदिग्रामीं राहिला भरत । अनुभविलें दुःख बहुत । याचा वांटा पावला ॥१८॥ आतां माझा वांटा लवणासुर । तो मज देइजे सत्वर । ऐसा कृपा करो रघुवीर । मज किंकरावर[3] ये काळीं ॥१९॥ माझा लाड पुरवावा । मज लवणासुर वांटा द्यावा । ऐसा कृपा करावी राघवा । कृपाळुवा कृपानिधे ॥२०॥ मज पाठवावें मधुपुरा । मी मारीन मधुकुमरा । जेणें भक्षिलें मुनिवरां । तयाचा सूड घेईन ॥२१॥

हे कार्य करण्याची संधी शत्रुघ्नाला देण्याची भरताला रामांची विनंती : ऐसी शत्रुघ्नाची मधुर गिरा। ऐकोनि सुख श्रीरामचंद्रा । म्हणे ऐक भरतवीरा । तुझा पराक्रम अद्भुत ॥२२॥ तूं मारिसील लवणासुरा । यदर्थी निःसंदेह कैकेयीकुमरा । परी पाठवावें शत्रुघ्नवीरा । तयासी हें कृत्य पैं दीजे ॥२३॥ शत्रुघ्नासी लवणासुर । वांटा देइजे सत्वर । ऐसें बोलोनि श्रीरघुवीर । पुनरपि बोलता पैं झाला ॥२४॥ लवणासुराचें निर्दळण । करील शत्रुघ्न निश्चयें जाण । तेथील शत्रुघ्ना राज्य देईन । मी तोषोन निश्चयेंसीं ॥२५॥ शत्रुघ्नासि राज्य मधुपुरीचें । लवणांती देईन साचें । ऐसें मुखकमळ श्रीरामाचें । वदतें झालें ते काळीं ॥२६॥ लवणासुर वधिलियाउपरी। तेथील राज्य शत्रुघ्ना करीं । अति रमणीय मधुपुरी । यमुनातीरीं वसली जे ॥२७॥ जेथील जन पुण्यवंत । नित्य नेमें अनुष्ठान करित । जयांचे दानीं उदार चित्त । जे संग्रामीं शूर पराक्रमी ॥२८॥ श्रीराम म्हणे शत्रुघ्नासी । असुर वधोनि तेथील राज्यासी । अंगीकारीं माझ्या वचनासी । मान देवोनि ये समयीं ॥२९॥ कनिष्ठें ज्येष्ठवचन । अवश्य करावें शास्त्रप्रमाण । वसिष्ठादि ऋषि पाचारून । तयांसि आज्ञा करिता झाला ॥३०॥ ऐसें रघुनाथ बोलिल्यावरी । मग तो शत्रुघ्न दैत्यारी । श्रीरामाप्रति मंद उत्तरीं । प्रार्थिता झाला ते वेळीं ॥३१॥

राज्य स्वीकारण्यास शत्रुघ्नाचा नकार : ऐकें नरवीरचूडामणी । राज्य ज्येष्ठ भरतावांचोनी । मज करितां अधर्म जनीं । यशा हानि होईल ॥३२॥ सोडोनियां ज्येष्ठ बंधु । कनिष्ठा राज्यपट अबद्धु । ऐसें असतां कृपासिंधु । राजा मज करूं नये ॥३३॥ मी लवणासुरातें वधीन । राज्यीं स्थापावा मांडवीरमण[4] । राज्य मधुपुरीचें भरता आपण । कृपा करोन देइजे ॥३४॥ लवणासुर घोरकर्मी । तुमचे आज्ञनें वधीन संग्रामीं । भरतासि अधिकार राज्यधर्मीं । मजलागोनि पैं नाहीं ॥३५॥ तुमचे आज्ञेसारिखे जन । वर्तताति स्वधर्मेकरून । तैसेच मी जैं न करीन । तैं दोष दारुण मज स्वामी ॥३६॥ शिर सांडोनि धडासि जाण । कोण पूजितसे रघुनंदन । ऐसें मज करितां परलोक शून्य । सत्य रामा होईल ॥३७॥ मी स्वामीचा आज्ञाधर[5] । आणि सेवेचा किंकर । परी हे अधर्मांचें उत्तर । मज सहावेना नरव्याघ्रा ॥३८॥ ऐसें शत्रुघ्नवचनानंतरें । कृपाळुवें श्रीरघुवीरें । संतोषोनि भरतलक्ष्मणांसामारें । आणि ऋषीश्वरां ऐकतां ॥३९॥

---

शब्दार्थ - १. भीती, २. वल्कल, हरिणाचे कातडें इ. परिधान करणारा, ३. सेवकावर, ४. भरत, ५. सेवक.

**शत्रुघ्नाला अभिषेक :** श्रीराम म्हणे भरतासी । वेगीं आणावें सर्व सामग्रीसी । राज्याभिषेक शत्रुघ्नासी । लवणवधासी मग धाडूं ॥४०॥ पाचारोनि ऋत्विज ब्राह्मण । ऋषि वसिष्ठादिकरून । आणि प्रधान सेवकजन । श्रीरामाज्ञा करिते झाले ॥४१॥ जाणोनि श्रीरामज्ञेसी । करिते झाले समारंभासी । जैसें देवीं इंद्रासी । तैसें राम करीतसे ॥४२॥ इंद्रभवनासमान । सुरुचिर गृहीं प्रवेशोन । शत्रुघ्नासी अभिषिंचन । करिते झाले ते समयीं ॥४३॥ चंद्रशेखर गंगाधर । स्कंदा[1] अभिषेकी तत्पर । तैसा श्रीराम धरणीधर[2] । अभिषेक केला शत्रुघ्नासी ॥४४॥ नगरवासी प्रजाजन । आणि पंडित मुनिगण । तिघी माता सुखसंपन्न । थोर संतोष पावल्या ॥४५॥ नगरस्त्रिया आणि पुरवासी । बहुत झाले अति संतोषी । म्हणती धन्य श्रीराम शत्रुघ्नासी । मधुपुरीचें राज्य देतो ॥४६॥ ऐसी नगरजनांची वार्ता ऐकोन । मग तो धरणिजापति आपण । शत्रुघ्नासी अभिषेक करून । वरदबाण देता झाला ॥४७॥

**श्रीरामांकडून लवणासुराला ठार करण्यासाठी शत्रुघ्नाला वरदबाणाची प्राप्ती :** श्रीराम म्हणे शत्रुघ्नासी । या बाणाचा महिमा परियेसी । हा शर धरित्या पुरुषासी । सदा यश कल्याण देतसे ॥४८॥ या बाणें निश्चयेसीं जाण । करिशील लवणासुराचें हनन । पुरुषव्याघ्रा संदेह न धरून । कार्यसिद्धि करीं वेगीं ॥४९॥ पूर्वी विधात्यानें हा बाण । निर्मिला दैत्यवधालागून । संग्राम करितां वैरियांसि जाण । अदृश्य बाण लक्षेना ॥५०॥ ब्रह्मदेवें क्रोधेंकरून । करावया दुष्टांचे निर्दळण । प्रतिपाळावया साधुजन । हा शर निर्माण पैं केला ॥५१॥ या शराचा पराक्रम थोर । येणे मारिले दैत्यदानव दुर्धर । हा शर घेवोनियां सत्वर । मधुपुरीस शत्रुघ्ना जाइजे ॥५२॥ पूर्वी रावणवधार्थी । हा शर मोकलिला नाहीं निश्चितीं । अनसूट[3] असे याची शक्ती । लवणासुरवधार्थी मी देतों ॥५३॥ तो शर मी तुजप्रती । देतों लवणासुरवधार्थी । आणिकही सांगू युक्ती । सावधवृत्ती अवधारीं ॥५४॥

**मधुपुरात न जाता त्याला बाहेर बोलवावे. शत्रुघ्नाला आदेश :** त्वां जावें मधुपुरांबाहेरी । प्रवेशावें ना नगरीं । दुरी राहोनि तो द्विजारी[4] । युद्धालागीं पाचारिजे ॥५५॥ तयासि शिवाचें वरदान । शिवें शूळ तया दिधला जाण । तो बळें तापसां कंदन । शूळ घेवोनियां करीतसे ॥५६॥ तुवां जावोनि नगरद्वारीं । शर धरोनि युद्धा पाचारीं । अवश्य मरण पावेल वैरी । सत्य जाण शत्रुघ्ना ॥५७॥ ऐसें करोनि शत्रुघ्ना । जय पावसी नाहीं अनुमाना । श्रीरामें करोनि प्रतिज्ञा । प्रयाण शत्रुघ्ना करविता झाला ॥५८॥ एका जनार्दना शरण । पुढील रसाळ निरूपण । श्रीरामें गोड रामायण । चरित्र गहन शतकोटि ॥५९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां मधुपुरीशत्रुघ्नराज्याभिषेको नाम अष्टपंचाशत्तमोऽध्यायः ॥५८॥ ओंव्या ॥५९॥

## अध्याय एकूणसाठावा

॥ श्रीकोदंडपाणये नमः ॥

### शत्रुघ्नाचा लवणपुरीत प्रवेश

मागिलें प्रसंगीं शत्रुघ्नासी । अभिषेकोनि मधुपुरीसीं । पाठवितसे लवणासुरासी । वधावयाकारणें ॥१॥

**शत्रुघ्नाला युद्धनीतीची शिकवण :** श्रीराम म्हणे शत्रुघ्ना । सवें घेईं असंख्य धना । धान्याचा

शब्दार्थ - १. कार्तिकस्वामीला, २. राजा, ३. राखून ठेवलेली, ४. ब्राह्मणशत्रू लवणासुर.

संग्रह करोनि जाणा । मार्गक्रमणा करावी ॥२॥ अश्व उत्तम अनेक । सर्वे घेईं असंख्य । रथ कुंजर सेना सेवक । नृत्यकारक तेही नेईं ॥३॥ जे मार्गी चालतां श्रमलियासी । गीत विनोद करिती संतोषीं । आप्तवर्गसेवकांसीं । धन बहुत पैं द्यावें ॥४॥ मार्गीं वैरियासि कळों न द्यावें । हळू हळू सैन्य पाठवावें । आपण स्थिर होवोनि जावें । उत्तम मार्ग पाहोनी ॥५॥ एकाएकीं मधुपुरीस जाण । धाडी घालोनि आपण । करीं लवणासुराचें निर्दळण । अन्यहस्तें मरण त्यासी नाहीं ॥६॥ आपण जावोनि मधुपुरीसी । कळों न द्यावें त्या दैत्यासी । एकाएकीं पाचारीं संग्रामासी । सावध मानसीं होवोनी ॥७॥ जान्हवीचे[1] तीरीं । सेना नेईं बा झडकरी । एक मास मार्ग क्रमोनि वैरी । दुश्चित करोनि मारावा ॥८॥ वरदबळें तो अति लाठा । तया कळों नेदीं वीरसुभटा । मग एकाएकीं मोक्षपुरीचा वांटा । रणरंगीं लावावा ॥९॥

**शत्रुघ्न युद्धार्थ निघाला :** ऐकोनियां श्रीरामवचन । शत्रुघ्नें वंदोनि श्रीरामचरण । रघुनाथा करोनि प्रदक्षिण । माता जाण वंदिल्या ॥१०॥ सद्गुरू जो कां वसिष्ठ । तयासि वंदोनियां स्पष्ट । लक्ष्मण आणि भरत ज्येष्ठ । तया नमन पैं केलें ॥११॥ श्रीरामाज्ञा वंदोनि शिरीं । शत्रुघ्नें तया अवसरीं । प्रयाण करोनि पुरीबाहेरी । सेनासहित उतरला ॥१२॥ तो शत्रुघ्न वीर कैसा । वैरितमनाशनीं[2] सूर्य जैसा । पुढें चालिला धरोनि जयाशा । लवणासुरवधाची ॥१३॥ सन्नद्ध सेना दळभार । सर्वे सैनिकवीर अपार । तयां पुढें करोनि शत्रुघ्न वीर । मागें आपण चालिला ॥१४॥ सेना करोनि पुढारी । शत्रुघ्नें मार्ग क्रमोनि मासवरी । सर्वेचि सत्वर दों दिवसांभीतरीं । मधुपुरीस येता झाला ॥१५॥

**शत्रुघ्नाचे वाल्मीकाश्रमास आगमन :** तंव त्या मार्गी वाल्मिकाश्रम । तेथे आला ज्येष्ठ बंधु जयाचा राम । सर्वे सेवक आज्ञाधर परम । पराक्रम जयाचा॥१६॥ ऐसा वीर दाशरथी। वाल्मीकाच्या आश्रमाप्रती । येवोनि ऋषींस विनंती। कर जोडून पैं केली ॥१७॥ अग ये स्वामी वाल्मीकमुनी । तुम्ही परोपकारी जनांलागोनीं । तुमच्या दर्शनें कृतार्थ प्राणी । जे यमनियमीं शिणताती ॥१८॥ तुमचें आश्रमीं आजि निशी । क्रमोनि उदयिक प्राचीदिशेसी[3] । जाणें आहे कर्तव्यकार्यासी । म्हणोनि तुमच्या दर्शनें सुखी झालों ॥१९॥ ऐकोनि शत्रुघ्नाचें वचन । सुखावला ऋषि संतोषोन । प्रेमें दिधलें आलिंगन । उल्हासे मन ऋषीचें ॥२०॥ ऋषि म्हणे शत्रुघ्नासी । जे जे नृप सूर्यवंशी । तयांचिये वस्तीसी । या आश्रमासी निर्मिलें ॥२१॥ वाल्मीक म्हणे दशरथात्मजा । माझी अंगीकारिजे पूजा । मग अर्पिली फळें मूळें वोजा । श्रीरामराजसुखार्थ ॥२२॥ करोनि मुनीचें पूजन । मग बोलता झाला शत्रुघ्न । दोनी करकमळ जोडून । वाल्मीकासी ते काळीं ॥२३॥ पूर्वील यज्ञींच्या विभूती । वाल्मीकमुनि कोठे असती । ऐकोनि वाल्मीक शत्रुघ्नाप्रती । बोलता झाला ते समयीं ॥२४॥ अगा ये शत्रुघ्ना अवधारीं । पूर्वी येथें याग केला त्याची नवलपरी । सौदासनामें राजा पृथ्वीवरी । तयाचे पुत्राचे वीर्यजस हो नाम ॥२५॥ वीर्यजस सौदासाचा पुत्र । अति धार्मिक गुणवंत । प्रतापें परवीरा अंत । भुजबळें करी ऐसा ॥२६॥ सौदासपुत्र शौर्यसंपन्न । निघाला पारधीलागून । तंव दोघे राक्षस दारुण । मृग मारितां देखिले ॥२७॥ शार्दूळरूपें[4] राक्षस घोर । देखोनि सौदासपुत्रा क्रोध थोर । त्यासीं युद्ध करोनि घोर । राक्षस एक मारिला ॥२८॥ मुष्टिघातेंकरोनि जाण । सौदासपुत्रें

---

**शब्दार्थ –** १. गंगेचे, २. शत्रुरूप अंधकार नाहीसा करण्याविषयी, ३. पूर्वदिशेला, ४. व्याघ्ररूपाने.

असुराचा घेतला प्राण । तयाचे साह्यालागोन । दुसरा राक्षस धांविन्नला ॥२९॥ तो राक्षस म्हणे वीर्यजसासी । निरपराधे माझे बंधूसी । मारोनि तूं कोठे जासी । तुझ्या प्राणासी मी घेईन ॥३०॥

**त्या राक्षसबंधूची सूड घेण्याची प्रतिज्ञा :** माझे बंधूसीं करोनि रण । निरपराधें घेतला प्राण । त्याचा सूड मी घेईन । अवकाशकाळें राजेंद्रा ॥३१॥ ऐसें राक्षस बोलिल्यावरी । मग सौदासपुत्र नृपकेसरी । येवोनि माझे आश्रमाअरवरी[1] । अश्वमेध मांडिला ॥३२॥ अश्वमेध महायज्ञ । आरंभिला वसिष्ठा पाचारून । रायें यज्ञदीक्षा घेवोन । बहु सहस्र वर्षे पैं झाली ॥३३॥ यज्ञसमाप्तीचे अंतीं । पूर्व वैर स्मरोनि राक्षस निश्चितीं । येता झाला वसिष्ठरूपाची बुंथी[2] । घेवोनियां ते काळी ॥३४॥ वसिष्ठाचें रूप धरोन । आला राक्षस कपटी जाण । रायासि म्हणता झाला आपण । मांसभोजन मज दीजे ॥३५॥ यज्ञसमाप्तीचे अंतीं । मांसभोजन मज करी तृप्ती । ऐसें वचन ऐकोनि नृपती । पाककर्त्या आज्ञा केली ॥३६॥ आजि वसिष्ठतृप्त्यर्थी । करीं मांसाची पाकनिष्पत्ती । येरें आज्ञा वंदोनि शीघ्रगतीं । विचार करिता पैं झाला ॥३७॥ येरीकडे राक्षस मायावी जाण । भाणवसां[3] गेला नरमांस घेऊन । सवेग पाकनिष्पत्ति करून । रायाजवळी देता झाला ॥३८॥ अहो जी राया मांस मिष्टान्न । याचा स्वाद अति गहन । वसिष्ठा देवोनि तृप्तिभोजन । आशीर्वचन पैं घ्यावें ॥३९॥ ऐसें करोनि रजनीचर । सर्वेचि प्रवेशला वन घोर । येरीकडे नृपें सत्वर । वसिष्ठा भोजना पाचारिलें ॥४०॥

**मांसभक्षण घडल्यामुळे वसिष्ठांचा राजाला शाप व उःशाप :** वसिष्ठासि करोनि आदर । भोजनीं बैसवी नृपवर । ऋषीनें जाणोनि नरमांसविचार । रायासि शापिता पैं झाला ॥४१॥ सक्रोध उंचबळोनी । म्हणे भला रे राया मजलागूनी । नरमांस देतोसी भोजनीं । म्हणोनि शाप दीधला ॥४२॥ मज करविसी नरमांसभोजन । तो तूं होसी मांसभक्षक जाण । ऐसा रायें शाप ऐकोन । स्त्रियेसहित विनविता झाला ॥४३॥ म्हणे स्वामी वसिष्ठमुनी । तुमचे आज्ञेकरूनी । मांस मागितलें म्हणोनी । ब्रह्मऋषे म्यां दिधलें ॥४४॥ ऐकोनि रायाचें विनीत वचन । क्षण एक वसिष्ठ धरोनि ध्यान । कळों सरलें राक्षस मायावी येऊन । येवढें विंदान पैं केलें ॥४५॥ तंव वसिष्ठ म्हणे रायासी । द्वादश वर्षे क्रमिलिया शापासी । निष्कृति[4] होईल तुझ्या देहासी । आनंदातें पावसील ॥४६॥ पूर्वील शापास्तव कर्म जाण । तयाची तुज न होईल आठवण । शापापासोन राया सुटोन । प्रजापाळण स्वधर्मे करिसी ॥४७॥ ऐसा वसिष्ठशापें भूपती । शाप पावला शत्रुघ्ना तुजप्रती । म्यां कथा सांगितली संकळितीं[5] । तयाचें यज्ञस्थळ पैं हें ॥४८॥ माझ्या आश्रमासमीप जाण । येथे करीत होता यज्ञ । तंव तो राक्षस येऊन । विघ्न केलें शेवटीं ॥४९॥ ऐसा वीर दाशरथी । कथा ऐकोनि सुखावला चित्तीं । सर्वेचि अस्ता गेला गभस्ती । निशाप्राप्ती पैं झाली ॥५०॥ पर्णशाळेसिं शत्रुघ्न । केलें सतां सुखें शयन । प्रहरद्वय शर्वरी क्रमिल्या जाण । तंव वाल्मीकाश्रमीं नवल झालें ॥५१॥

**सीता प्रसूत होऊन तिला दोन पुत्र झाले :** सीता होती गर्भवती । तियेसी झाली प्रसूती । पुत्रद्वय उपजले राती । बाळचंद्रासारिखे ॥५२॥ ऋषिपुत्रें मिळोनि जाण । वाल्मीकासी जाणवून । तंव सत्वर वाल्मीकें येऊन । जातकर्म[6] करिता झाला ॥५३॥ वाल्मीकें कुश[7] घेवोन । जातकर्मातें करोन । पहिल्या पुत्रा नामाभिधान । कुश ऐसें ठेविलें ॥५४॥ दुसऱ्या नाम लव

शब्दार्थ – १. आश्रमासमीप, २. सोंग, ३. पाकशाळेत, ४. मुक्तता, ५. थोडक्यात, ६. संस्कार, ७. दर्भ.

ऐसें । ठेविलें ऋषीं परमपुरुषें । वर देता झाला तुमचीं यशें । भुवनत्रयीं विकासती ॥५५॥ रक्षा[1] करोनि बाळकांसी । सर्वेचि जाणविलें शत्रुघ्नासी । येरें येवोनि उल्हासेंसीं । बाळकांसी पाहिलें ॥५६॥ तेथे क्रमोनियां निशी । उदय होतां गरुडाग्रजासी[2] । पूर्वाण्हिक[3] करोनि वाल्मीकासी । नमस्कारोनि निघाला ॥५७॥ तो शत्रुघ्न यमुनातीरीं । सप्त रात्री क्रमोनि मार्गीं । ऋषिआश्रमीं तया प्रसंगीं । हळू हळू काळ क्रमितसे ॥५८॥

शत्रुघ्नाचे च्यवनऋषींच्या आश्रमात आगमन : तंव देखिला च्यवनाश्रम । अति रमणीय पावन परम । तेथें वसती ऋषिसत्तम । तपोधन तेजस्वी ॥५९॥ च्यवनाश्रमीं करोनि वस्ती । ऋषीस नमन साष्टांगें करी विनंती । लवणासुराची बळशक्ती । मजप्रती सांगावी ॥६०॥ ऐकोनि दाशरथीचें वचन । बोलता झाला ऋषि च्यवन । म्हणे शत्रुघ्ना सावधान । लवणाख्यान अवधारीं ॥६१॥ तेणें शूळबळेंकरून । मारिले ऋषि तपोधन । निवटिले राक्षस दारुण । प्राणिजन पीडिले ॥६२॥

मांधात्याची कथा : पूर्वी अयोध्यानगरीचे ठायीं । इक्ष्वाकुकुळींचा युवनाश्व पाहीं । तयाचा पुत्र मांधाता लोकत्रयीं । विख्यात अति प्रसिद्ध ॥६३॥ तेणें पृथ्वी वश करून । राज्य करिता झाला आपण । कोणे एके काळीं स्वर्गा गमन । सुरलोक घ्यावया निघाला ॥६४॥ सर्व सेना असंख्य वीर । कोट्यनुकोटि कुंजर । अगणित घेतले रहंवर । इंद्रलोकअभिलाषार्थ ॥६५॥ शचीपतीचें राज्य घेईन । ऐसी उत्कंठा धरोनि मनें । पातला अमरावतीस जाण । इंद्रासनीं बैसावया ॥६६॥ ते पाकशासनें जाणोन । बुद्ध्याच मांधात्या प्रतिवचन । बोलता झाला गुणसंपन्न । सावकाश अवधारा ॥६७॥ अहो जी रविवंशनृपती । तुमची मृत्युलोकीं वस्ती । ते वश न करितां स्वर्गाप्रती । काय कारणें आलांती ॥६८॥ आधीं मृत्युलोक वश करून । मग घ्यावें सुरसदन । ऐसें एकोनि मांधाता जाण । क्रोधें संपूर्ण खवळला ॥६९॥ म्हणे अगा ये शचीपती । मज कोण वश नाहीं नृपती । तें मज सांगे गा शीघ्रगतीं । नाहीं तरी दंड करीन ॥७०॥ इंद्र म्हणे लवणासुर । जेणें बळकाविलें मधुपुर । तुमच्या देशासमीप नगर । त्यांसी कांही न चले तुमचें ॥७१॥ तो नाहीं तुमच्या अधीन । तो न जिंतितां इच्छितां स्वर्गभुवन । तंव मांधाता लज्जायमान । होवोनि समौन तटस्थ ॥७२॥ लवणासुराचे शिक्षेसी । मांधाता धाडी दूतांसी । असुरें भक्षिलें तयांसी । ऐकोनि क्रोधासी मांधाता चढला ॥७३॥ तैसाचि उठोनि सूर्यवंशी वीर । प्रवेशता झाला मधुपुर । युद्धा पाचारोनि लवणासुर । संग्राम घोर मांडिला ॥७४॥ मांधाता आणि लवणासुर । संग्राम करिते झाले घोर । लवणें शूळ टाकोनि सत्वर । मांधाता जीवें मारिला ॥७५॥ राजा निवटिला रणीं । सैन पडिलें रणमेदिनीं । लवणासुर विजयी होवोनी । मधुपुरीसी प्रवेशला ॥७६॥ शत्रुघ्ना शूळेंकरून । तेणें मारिले वीर दारुण । आतांच युद्धालागीं जाण । मधुपुरीसी नव जावें ॥७७॥ शूळ नाहीं लवणकरीं । ऐसें जाणोनि युद्धा पाचारीं । मग तया जिंतोनि विजयकरीं । गुढी उभवी राजकुमरा ॥७८॥ रुद्रहस्तींचा शूळ कठोर । मधूनें प्रसन्न केला कर्पूरगौर[4] । तयाचा शूळ आणि वर । प्राप्त झाला मधूसी ॥७९॥ तो शूळ मधूनें लावणासुरातें । दिधला शत्रुघ्ना निश्चितें । त्याचा मृत्यु तुझेनि हातें । जाण उदयिक होईल ॥८०॥ शत्रुघ्नें तेथें क्रमोनि निशी । उदय होतां गभस्तीसी । नमस्कारोनि च्यवनासी । प्रयाण करिता पैं झाला ॥८१॥

शत्रुघ्न मधुपुरीस आला त्या वेळी प्रात:काळीच लवणासुर शिकारीला बाहेर गेला होता : जे उतरोनि

---

शब्दार्थ – १. रक्षणाचा उपाय, २. अरुणाला, ३. पहिल्या प्रहरांतील कर्तव्य, ४. कर्पूराप्रमाणें शुभ्रवर्ण । (शंकर).

यमुनातीर । मार्गी चालतां शत्रुघ्न वीर । लोटलें जी दोन प्रहर । ते समयीं मधुपुर पावला ॥८२॥ मग येवोनि नगरद्वारीं । शस्त्रेंसीं शत्रुघ्न ते असवरीं । तिष्ठत राहिल्याउपरी । येरीकडे काय वर्तलें ॥८३॥ मधुपुत्रें काय केलें । प्रात:काळीं उठोन वन सेविलें । पारधी खेळतां मारिले चितळे । मृग व्याघ्र असंख्यात ॥८४॥ मारोनि श्वापदांच्या थाटी । वनीं भक्षी उठाउठीं । कित्येकांचा भारा बांधोनि पाठीं । नगरा उजु मुरडला ॥८५॥ रुधिरें डवरिला असुर । जैसा सेंदुराचा गिरिवर । खांदी कावडी सजीव क्रूर । मारोनि मांस घेतलेसें ॥८६॥ जैसा काळ प्रळयकाळीं । जीवमात्राची करी रांगोळी । होट न लावितां सगळेंचि गिळी । चाटी अवाळी[1] पुनरपि ॥८७॥

लवणासुर नगराकडे परतला : ऐसा राक्षस महाक्रूर । खांदी मांस चिथळत रुधिर । प्रवेशतां नगरद्वार । तंव शत्रुघ्नें देखिला ॥८८॥ जैसा कुठार[2] धरोनि करीं । उभ्या पादपाची[3] करी कांडोरी । तैसा लवण राक्षसारी[4] । देखता झाला ते समयीं ॥८९॥ लवण म्हणे धनुर्धरा । अनेक शस्त्रांचा करोनि भारा । उभा राहिलास चतुरा । आपुले वृत्तांता सांगावें ॥९०॥ म्यां भक्षिले अनेक प्राणी । न सांगतां गिळीन तुजलागोनी । अगा नराधमा झडकरोनी । आपला समाचार सांगावा ॥९१॥

शत्रुघ्नाचे त्याला प्रत्युत्तर : शत्रुघ्न ऐकोनि राक्षस वचन । बोलता झाला वीरपंचानन । म्हणे राक्षसा तुझा घ्यावया प्राण । मी आलों जाण दशरथात्मज ॥९२॥ जेणें मारिले रावण कुंभकर्ण । राज्यीं स्थापिला बिभीषण । तो श्रीराम माझा अग्रज[5] जाण । मी तुझा प्राण घेऊं आलों ॥९३॥ शत्रुघ्न नाम पैं माझें । आलों असे युद्धाचे व्याजें[6] । तुवां थांबोनि युद्ध कीजे । आर्त[7] पुरविजे पैं माझें ॥९४॥ शत्रुघ्नाचें कठिन वचन । ऐकोनि हांसे राक्षस जाण । म्हणे माझा मातुळ रावण । मजसीं युद्ध करूं न शके ॥९५॥ त्या रावणासी रामें मारिलें । हें अपूर्व श्रवणीं ऐकिलें । क्रोधाचें भरितें असे दाटलें । तयाच्या वधाकारणें ॥९६॥ तरी प्रथम तुझा वध करणें । मग श्रीरामासी मारणें । मातुळाचा सूड घेणें । दिनकरवंश निर्दाळूनी ॥९७॥ तरी तिष्ठत रोहें क्षणभरी । मी शस्त्रें आणीन तंववरी । येरू म्हणे सांपडल्या वैरी । हातींचा कैसा सोडावा ॥९८॥ आतां कैसा जासी मजपासून । निमेषें एका घेईन प्राण । ऐसें शत्रुघ्नें बोलोन । बाण गुणीं चढविला ॥९९॥ तुवां मारिले ऋषीश्वर । तापस भक्षिले अपार । त्याचा सूड घ्यावया शत्रुघ्नवीर । जाण निर्धार आलासे ॥१००॥ तुज मारोनियां जाण । सुखी करावे मुनिजन । मग येथील राज्यासन । रघुनंदन मज देईल ॥१॥ एका जनार्दना शरण । पुढिले प्रसंगीं लवणमरण । तेणें देव सुखी होतील जाण । आणि तपोधन सुखावती ॥२॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां शत्रुघ्नलवणपुरीप्रवेशो नाम नवपंचाशत्तमोऽध्याय: ॥५९॥ ओंव्या ॥१०२॥

## अध्याय साठावा

॥ श्रीरामचंद्राय नम: ॥

### लवणासुराचा वध

शत्रुघ्न-लवणासुराचे द्वंद्वयुद्ध : दाशरथि युद्धा प्रवर्तला । हें देखोनि लवण क्रोधें उंचबळला । दंतदाढा रगडूं लागला । हात चुरी कटकटा[8] करूनी[8] ॥१॥ लवणासुर म्हणे शत्रुघ्नासी ।

शब्दार्थ - १. जिभोळ्या, २. कुऱ्हाड, ३. वृक्षाची, ४. शत्रुघ्न, ५. वडील बंधू, ६. निमित्ताने, ७. आवड, ८. क्रोधाने.

आतां मजपासोनि कोठे जासी । कोणे मायेचे पोटीं रिघसी । केउता पळसी मंदबुद्धि ॥२॥ द्विजारीचें ऐकोनि वचन । मग तो दाशरथि वीर दारुण । काय करिता झाला आपण । शत्रुघ्न लक्षोनि ते काळीं ॥३॥ माझ्या भुजांचा पराक्रम गहन । आणि वज्रासारिखा बाण । घायें तुझा घेईन प्राण । तंव राक्षसें ताळ[1] घेतला ॥४॥ तो टाकिला शत्रुघ्नावरी । ताळ येतां देखोनि अंबरीं । दाशरथी वीर धनुर्धारी । बाणें शतखंड वृक्ष केला ॥५॥ सवेंचि दुसरा पादप घेतला । शत्रुघ्नावरी टाकिता झाला । अकस्मात येवोनि उरीं बैसला । वीर पडला मूर्च्छित ॥६॥ बाणें खंडन जंव करी । तंव वृक्ष आदळला उरीं । शत्रुघ्न पडोनि धरणीवरी । नावेक मूर्च्छेनें दाटला ॥७॥ शत्रुघ्न पडतांचि मूर्च्छित । देव झाले हाहाभूत । ऋषीश्वर चळचळ कांपत । म्हणती कोण पुरुषार्थ राक्षसाचा ॥८॥ शत्रुघ्नासारिखा वीर रणीं । मूर्च्छित पाडिला रणमेदिनीं । राक्षस विजयी होवोनी । गर्जोनि उभा ठाकला ॥९॥ राक्षस म्हणे शस्त्रायुधाचें । प्रयोजन नाहीं येथें साचें । मनुष्यमात्र आहार आमुचें । तयावरी शस्त्रें कशाला ॥१०॥ शत्रुघ्न मूर्च्छित देखोन । राक्षस प्रवेशे स्वभवन । ऐसें निमेष एक क्रमिलें जाण । वीर रामानुज ऊठिला ॥११॥ तदनंतरें दिव्य अमोघ शर । करी घेवोनि उत्तम शत्रुघ्न वीर । शराचे तेजे अंबर । दैदीप्यमान होऊन ठेलें ॥१२॥ वज्रासारिखें मुख जाण । वज्राहूनि वेग गहन । मेरुमांदारासारिखा कठिण । समरीं वैरी निर्दळीतसे ॥१३॥ शराअंगीं अहिप्रियलेपन[2] । शशीऐसें शोभे वदन । वरी रावणारीचें झळकत नाम । तेणें व्योम लखलखित ॥१४॥ काळदंडासमान शर । तेणें शशिसूर्य भयातुर । गगनीं नक्षत्रें ग्रह क्रूर । धाके थरथर कांपती ॥१५॥ बाणाची ध्वनि अति गाढी । धरणी गेली तिरढोविरढी[3] । कूर्माची पाठी तडाडी । वृक्षपानझडी तेणें झाली ॥१६॥ देखोनियां सर्व जीवजंत । धाकें हाहाकार करित । सिद्ध[4] चारण महानुभाव संत । अप्सरा कांपत चळचळीं ॥१७॥ ऐसें सकळही देव मिळोन । तिहीं प्रार्थिला चतुरानन । बोलते झाले भय दारुण । युगांतासारिखें ओढवलें ॥१८॥ आजि होईल प्रळय-काळ । ऐसें ओढवलें जगड्व्याळ । पूर्वी ऐसें भय सबळ । देखिलें नाहीं पितामहा ॥१९॥ ऐकोनि तयांचें वचन । बोलता झाला चतुरानन । ऐका समस्तही मिळोन । सावधान मानसीं ॥२०॥ लवणासुरवधाकारणें । ठाण मांडोनि शत्रुघ्नें । गुणीं शर चढविला तेणें । सकळांचीं मनें भ्रांत झालीं ॥२१॥ लवणासुरवधी तुम्हांसि सुख । देईल दाशरथी वीर देख । यालागीं मिळोनि सकळिक । सावधवृत्तीं रहावें ॥२२॥ सकळां देवांसहित । ब्रह्मदेव आला तेथ । जेथें दाशरथी वीर चढवोनि सीत । ठाण माहेश्वरी[5] मांडिलें ॥२३॥

**लवणासुराचा वध व देवादिकांना आनंद :** आकर्ण ओढोनि कानाडी । बाण सोडिला कडाडीं । जावोनि लवणासुराचे हृदयपरवडी[6] । भेदोनी रसातळ प्रवेशला ॥२४॥ सवेंचि येवोनियां बाण । शत्रुघ्नभातां प्रवेशला जाण । येरीकडे हृदय विदारून । दैत्य भूमीं पडियेला ॥२५॥ दैत्य पडतांचि भूमीवरी । स्वर्गींहूनियां सुरवरीं । पुष्पवृष्टि करोनि ते अवसरीं । गंधर्वी नृत्य आरंभिलें ॥२६॥ अप्सरा नाचती उल्हासे थोर । ऋषींचें फिटलें भयशारें[7] । त्रैलोक्यीं आनंद-गजरें । जयजयकार पैं केला ॥२७॥ येरीकडे लवणाचा शूळ । प्रवेशता झाला गगनमंडळ । क्रमोनि लोकालोक प्रबळ । कैलासासी पैं गेला ॥२८॥ सकळ सुरवरांदेखत । शूळ प्रवेशला जेथें पार्वतीकांत । श्रीरामानुज विजयान्वित । उल्हास अद्भुत सैन्या झाला ॥२९॥ हर्षे

---

शब्दार्थ -१. तालवृक्ष, २. चंदनाची उटी, ३. डळमळून, ४. देवयोनिविशेष, ५. शिवाचें, ६. छातीमध्ये, ७. भयकंप.

वांटिती साखर । आनंदे नाचती ऋषीश्वर । एक पाडतां लवणासुर । त्रैलोक्यीं जयजयकार पैं झाला ॥३०॥ लवणासुर रणीं पडिला । वीरीं देवीं कैसा देखिला । पर्वतकडा लोटला । कीं उन्मळिला तरुवर ॥३१॥ माथां केश बाबरझोटी । भयानक रूप रुधिर वाहे सृष्टीं । देखोनि देवांच्या झांकल्या दृष्टी । भ्यासुर मोठी तनु त्याची ॥३२॥

**देवांकडून शत्रुघ्नाची प्रशंसा व त्याला वरदान :** सकळ मिळोनि सुरवर । बोलते झाले शत्रुघ्नासमोर । म्हणती आश्चर्य देखिलें थोर । आजिचें पैं समरांगणीं ॥३३॥ भाग्येकरोनि लवणासुर । तुवां निवटिला दुर्धर । आजि आमचें पुण्य थोर । राक्षस घोर मारिला ॥३४॥ इंद्रासहित सुरगण । आम्ही सकळही सुप्रसन्न । तुज देतों वरदान । महाबाहो राघवानुजा ॥३५॥ विजयीं होई सर्वां ठायीं । शत्रुदमनीं[1] शक्ति घोर पाहीं । देवांचे वचन ऐकोनि ते समयीं । दाशरथी बोलता झाला ॥३६॥ हेचि मधुपुरी नगरी । अति रमणीय यमुनातीरीं । दैत्यें उद्वस[2] करोनि बहुत काळवरी । मनुष्यें भक्षोनि राहिला ॥३७॥ आतां वसे हें नगर । ऐसी कृपा करोनि सत्वर । मजही रहावया तुम्ही वर । दिधला पाहिजे स्वामी हो ॥३८॥ राघवानुजाचें[3] ऐकोनि वचन । ऋषी संतोषले जाण । बरवें म्हणोनि वरदान । देते झाले ते समयीं ॥३९॥ जे जे हृदयींची उत्कंठा । ते ते पावसी नरश्रेष्ठा । तुवां राक्षसां दिधला देशवटा । उपकार मोठा तुवां केला ॥४०॥ सर्व सेनेसहवर्तमान । तूं प्रवेशें राजभवन । देवां द्विजांचें करीं पाळण । सुखसंपन्न होउनी ॥४१॥

**नगरांत प्रवेश व तेथे अकरा वर्षे वास्तव्य :** ऐसें वदोनि शत्रुघ्नासी । देव निघाले स्वर्गासी । मागें लवणारीनें सर्व सैन्यासीं । प्रवेश केला नगरीं त्या ॥४२॥ नगरीं प्रवेशला शत्रुघ्न । वधिला लवणासुर दारुण । हें ऐकोनि देशांतरींचें जन । गेले होते ते आले ॥४३॥ लोकांसि देवोनियां अभय । मग तो दशरथतनय । गृहमंदिरें उभवोनि सुवर्णमय । ब्राह्मणांसि देता झाला ॥४४॥ लवणासुराचें जें वसतिस्थान । तें शत्रुघ्नें केलें नूतन । हाट हटवाटिया बिदी जाण । वाणी व्यवहारी सधन राहिले ॥४५॥ चहूं वर्णांचे लोक । चौं वेदांचे वेदपाठक । चहूं आश्रमांचे जन अनेक । वस्तिसुख पावते झाले ॥४६॥ नगराभोवतीं उद्यानें । नानापरींचीं पुष्पें वनें । आम्रवनें मधुवनें । नारिकेळीवनें असंख्य ॥४७॥ रंभा[4] आणि द्राक्षामंडप । जांबळी खर्जुरी चंपक । फणस आंवळी कपित्थक । वट अशोक अगणित ॥४८॥ ऐसिये रम्य नगरीं । स्वधर्मे राघवानुज राज्य करी । द्वादश वर्षे लागता अंतरीं । रघुनाथभेटी इच्छिता झाला ॥४९॥ अयोध्या सोडोनि आपणास । क्रमिलीं येथें वर्षे एकादश । बारावें प्रवर्तलें अग्रजभेटीस । जाऊं आतां येथोनी ॥५०॥

**शत्रुघ्न रामभेटीसाठी निघाला :** ऐसा करोनि निश्चय । काय करी कैकेयीतनय । कित्येक सेना घेवोनि जो कौसल्यातनय । तयाचे भेटी निघाला ॥५१॥ उर्वरीत जें सैन्य । तें मधुपुरीस ठेवोनि रक्षण । आपण निघाला भेटीलागून । श्रीरामाचे ते काळीं ॥५२॥ तदनंतरें तो लवणारी । चालिला जेथ श्रीराम पाळित पुरी । बारा वर्षे प्रवर्तल्या अंतरीं । थोर उत्साहें निघाला ॥५३॥ सवें घेवोनि अल्प सैन्य । अल्प अश्व अल्प सेवकजन । अल्प सवें घेवोनि वारण । किंचित रथ घेतले ॥५४॥ अल्प सैन्येंसहित । दाशरथी मार्ग क्रमित । तंव वाल्मीकाश्रम अकस्मात । देखिला मार्गीं ते समयीं ॥५५॥ ऋषिआश्रम देखोन । संतोषला दशरथनंदन । प्रवेशला वाल्मीकभवन । तयाचिया दर्शना ॥५६॥ वाल्मीका करोनि नमस्कार । तद्दिनीं तेथें

शब्दार्थ – १. शत्रुचा नाश करण्याकरिता, २. ओसाड, ३. शत्रुघ्नानें, ४. केळी.

होवोनि स्थिर । मुनीची पूजा घेवोनि नृपवर । स्वस्थासनीं बैसला ॥५७॥

**वाल्मीकींनी शत्रुघ्नाची प्रशंसा केली :** तया समयीं वाल्मीकमुनी। कथा सांगता झाला दाशरथीलागूनी । शत सहस्र अगणित वाणी । श्रीरामाची चरित्रें ॥५८॥ वाल्मीक म्हणे दाशरथीसी । त्वां वधिलें लवणासुरासी । हें ऐकोनि संतोष मानसीं । बहुसाल मज झाला ॥५९॥ मधुवनीं तो लवणासुर । वसतां भक्षिलें प्राणी अपार । विशेषें भक्षिले ऋषीश्वर । तो त्वां सहज निर्दळिला ॥६०॥ जगत्रयाचें भय नाशिलें । लवणासुरा वधोनि सुखी केलें । युद्ध करितां म्यां देखिलें । इंद्रापासीं बैसोनी ॥६१॥ संतुष्टलों तुझिया गुणां । म्हणोनि मूर्ध्नि अवघ्राणोनि[1] जाणा । इतुके बोलोनि फळें नाना । विचित्रें आणिलीं ते काळीं ॥६२॥ नानापरींची शत्रुघ्नासी । फळे अर्पोनियां ऋषी । मग आरंभिलें गायनासी । ते समयीं गायकीं ॥६३॥ वीणा मृदंग टाळ मोहरी । वाद्यें वाजताती नानापरी । श्रीरामचरित्रें ते अवसरीं । गाते झाले गंधर्व ॥६४॥ अयोध्येहूनि केलें प्रयाण । श्रीरामें वनवास सेविला जाण । तेथोनि वधून रावण । जानकी घेवोन अयोध्ये आला ॥६५॥ ऐसें श्रीरामाचें चरित्र । ऐकोनि शत्रुघ्न मूर्च्छागत । क्षणैक होवोनि सावचित्त । पुनरपि ऐकत पैं ठेला ॥६६॥ श्रीरामाचें चरित्र पावन । कोटि ब्रह्महत्या करी दहन । ऐसें ऐकतेक्षणीं प्रेम । शत्रुघ्नासी दाटलें ॥६७॥ सर्वे सैनिक वीर होतें । तयांसी प्रेम दाटलें तेथें । प्रेमें अवघे झाले नाचते । श्रीरामचरित्रा ऐकोनी ॥६८॥ रावणाचें चरित्र ऐकोन । प्रेमें वीर झाले मग्न । इतुकें वर्तल्यावरी कथानुसंधान । सावधान अवधारिजे ॥६९॥

**तेथून शत्रुघ्न सर्व सेनेसह अयोध्येला निघाला :** क्रमोनियां ते शर्वरी । सेना सज्जोनि ते अवसरीं । नमस्कार करोनि लवणारी । मुनीस पुसोनि निघाला ॥७०॥ श्रीरामदर्शनाची उत्कंठा । मार्गीं चालतां दडदडाटा । इंद्रियनाथाहून वेग मोठा । अयोध्येचें शेवटा येते झाले ॥७१॥ तें अयोध्या देखिली कैसी । अमरपुरीहूनि विशेषी । कैलास जीचे उपमेसीं । तुळणेसी पैं नये ॥७२॥ सुवर्णकळसांचिया हारी । रत्नदीप घरोघरीं । उत्तममध्यमीं हाटक घरी । सुखसंभारीं असिजे हो ॥७३॥ कोणा नाहीं दुःख दैन्य । घरोघरीं श्रीरामकीर्तन । श्रीरामकथा श्रीरामगायन । स्वानंदीं मग्न जन वसती ॥७४॥ सूर्यवंशी नृपकेसरी । जयाचे स्मरणें संसार दुरी । सकळ जन सहपरिवारीं । रावणारी वसे जेथें ॥७५॥ ऐसिये अयोध्येभीतरीं । प्रवेशला तो लवणारी । सदना उजू येवोनि ते अवसरीं । श्रीरामाची देखिले ॥७६॥

**श्रीरामांना वंदन व निवेदन :** करोनियां साष्टांग नमन । चरणांवरी माथां ठेवोन । अग्रजें दिधलें आलिंगन । समाधान येरयेरां ॥७७॥ लवणारी म्हणे रावणारीस । तुमचें आज्ञेनें मधुपुरीस । प्रवेश न करितां पुरद्वारीं राक्षस । पारधीहूनि आला ॥७८॥ तुमचे कृपेंकरून । नगरद्वारीं देखिला लवण । युद्धीं त्यासी मोक्ष देवोन । पुरीस प्रवेशन पैं केलें ॥७९॥ दैत्यभयेंकरोनि पुरी । उद्वस[2] होती मधुनगरी । ते वसवोनि द्वादश वर्षांवरी । आम्हांवीण तेथें राहिलों ॥८०॥ तुजवीण रघुनाथा । नावडे मज राज्यपदार्था । तुजवीण भोग भोगितां । ते अधःपाताचें मूळ ॥८१॥ जैसें जननीवेगळे बाळक । तैसें येथें मी होतों रंक[3] । चंद्रावेगळें चकोर देख । पडे उपवास न देखतां ॥८२॥ जैसे रविउपासक जन । न होतां सूर्याचें दर्शन । तयांसि पडे लंघन जाण । तैसें तुजवीण श्रीरामा ॥८३॥ तुझियें आज्ञेकरून । केलें प्रजेचें पाळण । रात्रंदिवस तुझें ध्यान ।

---

शब्दार्थ - १. हुंगून, २. ओसाड, ३. दीन.

करितों जाण श्रीरामा ॥८४॥ नित्य अनुदिनीं सावकाश । पाहें अयोध्येची वास[1] । युगासमान एक दिवस। ऐसीं वर्षे द्वादश कंठिली ॥८५॥ माझा तूं आत्मा माझा तूं प्राण । माझी मातापिता रघुनंदन । माझे गणगोत जानकीरमण । तेथें संशय जाण असेना ॥८६॥

रामांच्या आज्ञेने शत्रुघ्नाचे परत मधुपुरीला गमन : ऐसें शत्रुघ्नाचें ऐकोनि वचन । मग काय बोलिला धरणिजारमण[2] । माझे आज्ञेनें दुष्टदळण । करोनि यश पावलासी ॥८७॥ विप्रजनां सुख दिधलें । सकळ सुरवरां संतुष्ट केलें । पुनरपि माझें दर्शन घेतलें । यश जोडिलें त्रैलोक्यीं ॥८८॥ माझें दर्शन झाल्याउपरी । अयोध्ये राहीं सप्त रात्रीं । पुनरपि तूं मधुनगरीं । जावोनि राज्य करावें ॥८९॥ पद्माक्षीरमणाचें ऐकोनि वचन । मग शत्रुघ्नें सप्त रात्री क्रमून । श्रीराममाता अभिवंदून । वसिष्ठा नमन पैं केलें ॥९०॥ वंदोनि भरतलक्ष्मण । शत्रुघ्नें रथीं आरूढोन । मधुपुरीस केलें गमन । श्रीरामाज्ञा वंदोनी ॥९१॥ भरत लक्ष्मण बोळवीत[3] गेले । ते पुनरपि मुरडोनि अयोध्ये आले । तदनंतर काय वर्तलें । तें अवधारिजे श्रोते हो ॥९२॥ एका विनवी श्रोते जनार्दना । तुमचे दासाचा दास पोसणा । सलगी[4] करितसें चरणां । लागोनियां तुमचिये ॥९३॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरघुनाथशत्रुघ्नदर्शन-लवणासुरवधो नाम षष्ठितमोऽध्यायः ॥६०॥ ओंव्या ॥९३॥

## अध्याय एकसष्टावा

॥ श्रीरघुपतये नमः ॥

### श्रीरामाचे अगस्त्याश्रमांत गमन

शत्रुघ्न गेला मधुपुरीसी । मागें श्रीराम भरत लक्ष्मणेंसीं । राज्य करितां अयोध्येसी । पुढें काय वर्तलें ॥१॥

रामांच्या अधर्माचरणानेच आपला लहान मुलगा मृत्यू पावला अशी एका ब्राह्मणाची शंका : कोणी एक द्विज पुण्य पवित्र । अग्निहोत्री महापंडित । चारी वेद मुखोद्गत । धर्मीं तप्तर स्वधर्मे ॥२॥ ऐसा तो गुणसंपन्न । तयाचें बाळक पांचसात वर्षांचें जाण । ते अकाळीं पावलें मरण । दुःख दारुण विप्रासी ॥३॥ तेणें द्विजें घेवोनि बाळक । महाद्वारा आला करीत शोक । स्नेहें रुदन करी देख । नाना विलापें कपाळपिटी ॥४॥ म्हणे मी नाहीं आचरलों अधर्म । म्यां नाहीं केलें निंद्य कर्म । वादीं छळिले नाहींत ब्राह्मण । स्वकर्मा जाण चुकलों नाहीं ॥५॥ म्यां कोणाचा न केला अपराध । म्यां कोणासीं न केला विवाद । मी अबद्ध[5] जपलों नाहीं वेद । कोणाचा नाहीं अपवाद[6] उच्चारिला ॥६॥ पंचवार्षिक माझें बाळ । तारुण्य जरा न येतां केवळ । साधूनियां काळ वेळ । माझें तान्हें बाळ हरिलें कैसें ॥७॥ रघुनाथराज्यीं पूर्ण आयुष्य । काळाचा तेथें नाहीं प्रवेश । अधर्माचा नाहीं लेश । तरी मी कां क्लेश पावलों ॥८॥ माझें एकुलतें तान्हें जाण । कोणें पापें पावलें मरण । तयासवें आम्ही प्राण । श्रीरामद्वारीं देह सांडूं ॥९॥ ऐसें पूर्वी नाहीं ऐकिलें । श्रीरामराज्यीं अपूर्व झालें । याबरोबर आम्ही सकळें । आपुलें देह पैं त्यागूं ॥१०॥ श्रीरामाचे अधर्मे करून । माझें बाळक पावलें मरण । यदर्थीं कांही संदेह

---

शब्दार्थ - १. वाट, २. राम, ३. पोहचवीत, ४. मैत्री, ५. अयोग्य, ६. दोष.

जाण । अनुप्रमाण असेना ॥११॥ ऐसी द्विजोत्तमाची करुणा । ऐकोनि जानकीरमणा । बाळकदु:खें तया जाणा । थोर खेद पावला ॥१२॥

रामांचा सर्व ऋषींना प्रश्न : श्रीरामें बाळ देखोन । अत्यंत करुणा उचंबळोन । सभे बैसले तेही जन । थोर आश्चर्य पावले ॥१३॥ मग बोलावोनि ऋषीश्वर । वसिष्ठ वामदेव थोर थोर । गौतम जाबाली अत्रि आणिक मुनिवर । सभे येवोनि बैसले ॥१४॥ तयांसि करोनि नमन । अभिवंदन आणि पूजन । आसनें उत्तम देवोन । तपोधन बैसविले ॥१५॥ नारदही तेथें आला । श्रीरामें आलिंगून पूजिला । वरासनीं बैसविला । तपोधनांजवळी हो ॥१६॥ मृतबाळकाच्या वृत्तांता । श्रीरामें सांगितलें समस्तां । तंव नारद झाला बोलता । धर्मशास्त्रनीतीतें ॥१७॥

नारदांचे धर्मशास्त्रांचे दिग्दर्शन : ऐकें गा श्रीरघुपती । बाळक निमालें जे अर्थी । पूर्वी कृतयुगाप्रती । ब्राह्मण तप करित होते ॥१८॥ विप्रावेगळे तपीं तत्पर । इतरांसी नाहीं अधिकार । त्रेतायुगाचे ठायीं राजन्यां[1] अधिकार । तपीं असे राजेंद्रा ॥१९॥ आणिक कृतत्रेतायुगीचें जन । आपुले स्वधर्मी असती जाण । तेथें नाहीं अकाळ मरण । दोहीं युगांचा हा महिमा ॥२०॥ त्रेतायुगीं करोनि नेम । स्थापिले चारी वर्ण उत्तम । अनधिकारी तप करोनि अधर्म । एक चरणीं चालता झाला ॥२१॥ अधर्मांचा प्रथम चरण । श्रीरामा प्रर्वतला जाण । जे राष्ट्रीं अनधिकारी साधन । करिताती जाण तैं मृत्यु पावे ॥२२॥ अनधिकारी करितां तप । अनधिकारी करितां जप । अनधिकारी पूजापडप[2] । घेती ते जनां मृत्युपीडा ॥२३॥ त्रेतायुगाभीतरीं । तप करिती वैश्यशूद्र अनधिकारी । तयांचें पापें पीडा भारी । रायासि होय राजेंद्रा ॥२४॥ तयांचे अधर्मे अनृतेंकरोन[3] । प्रजेसी पीडा वर्षे पर्जन्य । बहुकाळ पडे अवर्षण । राज्यपद जाण स्थिर नव्हे ॥२५॥

शूद्रांच्या पापाचरणामुळे ब्राह्मणपुत्रांचा मृत्यू : द्वापरीं तप त्रिवर्णांसी । ब्राह्मण क्षत्रिय वैश्यांसी । शूद्रें न करावें तपासी । निजकर्म आचरावें ॥२६॥ तयाच्या पापेंकरून । द्विजबाळक पावले मरण । यदर्थीं संदेह नाहीं जाण । पृथ्वीशोधन करावें ॥२७॥ राजा होत्साता जाण । जो न करी पापपुण्यविवेचन । तयासि होय अध:पतन[4] । संदेह जाण असेना ॥२८॥ ऐसी असे धर्मनीती । हे शीघ्र विचारोनि जानकीपती । पुढील कार्याची उत्कंठा चित्तीं । धरोनि राहटी करावी ॥२९॥

मृत बालकास तेलाच्या द्रोणींत ठेवावयास सांगून श्रीराम पुष्पक विमानांतून संचारार्थ निघाले : ऐसें नारदाचें वचन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । वेगीं पाचारोनि लक्ष्मण । काय बोलता पैं झाला ॥३०॥ ऐकें सौमित्रा झडकरी । द्विजा आश्वासोनि मधुरोत्तरीं । बाळकाचें शरीर स्नेहाभीतरीं[5] । तळोनियां राखावें ॥३१॥ बाळकाची वपु तैलीं तळून । द्रोणीमाजि[6] ठेवावी करोनि यत्न । नानापरींचें सुगंध पाळून । संस्थापन करावें ॥३२॥ ऐकोनी श्रीरामाचें वचन । सौमित्रें विप्रा आश्वासून । बाळकाचें शरीर तैलीं तळून । द्रोणीमाजि स्थापून रामाजवळी आला ॥३३॥ श्रीरामें क्षण एक धरोनि ध्यान । केलें पुष्पकाचें आवाहन । तत्काळ पुष्पक येवोनि जाण । कर जोडून राहिलें ॥३४॥ पुष्पक म्हणे श्रीरामा । तुमची आज्ञा प्रमाण पुरुषोत्तमा । तूंचि माझा निजात्मा । सत्य मीं किंकर स्वामीचा ॥३५॥ ऐकोनि पुष्पकाचें वचन । संतोषोनि रघुनंदन । ऋषीस करोनियां नमन । विमानारूढ पैं झाला ॥३६॥

---

शब्दार्थ - १. क्षत्रियांना, २. पूजेची आवड, ३. खोटे वर्तनामुळे, ४. नरकवास, ५. तेलामध्ये, ६. कढईत.

पूर्व-पश्चिम व उत्तर दिशेस रामांना अधर्माचरण आढळले नाही : श्रीराम चापशरपाणी । ये शुद्ध पश्चिम देखोनी । अधर्माची वार्ता कानीं । ते दिशीं न पडली ॥३७॥ नगरीं स्थापोनि भरतलक्ष्मण। आपण करिता झाला प्रयाण । नाना वनें उल्लघोंनि जाण । पश्चिमदिशे पैं आला ॥३८॥ तदनंतरें उत्तरदिशेसी । श्रीराम निघाला शोधनासी । हिमाचळाचे प्रदेशीं । तापसी स्वधर्मे अनुष्ठान करिती ॥३९॥ तेथें नाहीं पापाचा लवलेश । शुद्ध सात्विक जन बहुवस । सदा भगवद्भजनीं उल्हास । आशापाश सांडोनी ॥४०॥ तयाउपरी पूर्वदिशेसी । श्रीराम निघे शुद्धीसी । जगन्नाथपर्यंत पहातां त्यासी । अधर्म दृष्टीसी दिसेना ॥४१॥ नीळकंठ नेपाळ वैजनाथ । पूर्वबंगाल वोडसा समस्त । कैकट मागध गया तेथ । देश त्वरित शोधिले ॥४२॥ सर्वां ठायीं भगवद्भजन । ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र जन । आपुलाले स्वधर्मी होवोनि लीन । श्रीरामकीर्तन पैं करिती ॥४३॥

दक्षिणदिशेला एका तापस शूद्राला धूम्रपान करताना पाहून रामांचा त्याला प्रश्न : तयाउपरी दक्षिणदिशेसी । श्रीराम निघाला शोधावयासी । शेषाचळाचे उत्तरपार्श्वी । सरोवर एक देखिलें ॥४४॥ अति रमणीय तोयपूर्ण। परिवेष्टित कमळिणी जाण । तयाचे तीरीं तापस धूम्रपान । अधोमुखें करीतसे ॥४५॥ अधःशिर[1] ऊर्ध्वचरण[2] । मुखीं नळिका लावोनि जाण । करीतसे धूम्रपान । तया रघुनंदन देखता झाला ॥४६॥ श्रीराम समीप येवोनी । बोलता झाला मधुर वचनीं । म्हणे धन्य धन्य तूं मुनी । देखोनि नयनीं सुख झालें ॥४७॥ कोण याति[3] कोण वर्ण । कोण ग्राम कोण अभिधान । तप करावया काय कारण । कोण इच्छा हृदयीं असे ॥४८॥ विनोदार्थ महामुनीं । हें मज सांगें विस्तारोनी । स्वर्गप्राप्तीलागीं धूम्रपानीं । प्रवर्तलासी तापसा ॥४९॥ एवढे करोनि सायास । कोण कार्या चिंतितोस । येरें एकोनि श्रीरामवचनास । उत्तर देता पैं झाला ॥५०॥

तापसी शूद्राचे उत्तर ऐकून रामांकडून त्याचा शिरच्छेद. देवांना आनंद : म्हणे ऐकें गा ये शरचाप–पाणी । मी प्रवर्तलों धूम्रपानीं । त्या फळाची इच्छा तुजलागोनी । आणिक स्वयातिही प्रकट करीन ॥५१॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य जाण । या तीन्ही याति नाहींत मजलागून । केवळ शूद्र मी अनुष्ठान । कार्या कारण करितसें ॥५२॥ येणें शरीरें देवत्व प्राप्त । व्हावया तप करितों निश्चित । पूज्य व्हावें लोकांत । मान महत्त्व पावावया ॥५३॥ ऐकोनि तापसाचें वचन । श्रीरामें खड्ग घेवोनि जाण । मस्तकीं हाणोनि शिर छेदून । धरणीवरी पाडिलें ॥५४॥ शिर पडतां धरणीवरी । स्वर्गी देव जयजयकारीं । इंद्रादिक सामोरे येवोनि ते अवसरीं । श्रीरामासि स्तविते झाले ॥५५॥ भला भला गा धरणिजापती । म्हणोनि पुष्पवर्षाव करिती । देवकार्या–लागोनि रघुपती । अवतरलासी रविवंशीं ॥५६॥ हा दुरात्मा भला मारिला । त्रैलोक्यासी आनंद झाला । देव म्हणती वर माग वहिला[4] । प्रसन्न झालों तुजलागीं ॥५७॥ जें मागसी तें यें,समयीं । श्रीराम सत्य देऊं पाहीं । ऐसें बोलोनि ते सर्वही । थोर आनंद पावले ॥५८॥

मृतबालकास जिवंत करण्याचा वर श्रीराम देवांजवळ मागतात : सुरांचे मुखीं बळीचें वचन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । म्हणे स्वामी झालेति प्रसन्न । तरी मृतबाळका उठवावें ॥५९॥ अयोध्येमाजी वृद्ध द्विजाचें बाळ । मृत्यु पावलें अकाळ । उठवोनि तुम्हीं प्रबळ । यश मज पैं द्यावें ॥६०॥ देव म्हणती श्रीरामा । हा वधिला दुष्टात्मा । तेव्हांच त्या बाळकाचा आत्मा । कुडीमाजी प्रवेशला ॥६१॥ जे काळीं शिर छेदिलें । तेव्हाच तयाचे प्राण आले । त्याच्या

शब्दार्थ - १. खालीं मस्तक, २. वर, ३. ज्ञाती, जाती, ४. सत्वर.

मातापित्यांसी सुख झालें । सुहृद स्वजनगोत्रांसीं ॥६२॥ देवऋषी म्हणती श्रीरामा । आम्ही जातों अगस्त्याश्रमा । दीक्षा घेतलीसे पुरुषोत्तमा । जळी वास अगस्तीनें केला ॥६३॥ द्वादशवर्षपर्यंत । जळीं शय्या करी अगस्ति तेथ । तयाचे व्रतपरिपूर्णार्थ । जाऊं तेथ श्रीरामा ॥६४॥ तुम्हींही तेथवरी यावें । अगस्तीचें दर्शन घ्यावें । तयाचें व्रत श्रीराघवें । परिपूर्ण आघवें करावें ॥६५॥

**श्रीरामांचे अगस्तींच्या आश्रमाला आगमन :** ऐकोनि देवांचे वचन । पुष्पकीं आरूढोनि रघुनंदन । देवांसहित आला जाण । अगस्तिआश्रमा ते काळीं ॥६६॥ देव भेटले अगस्तीसी । घेवोनि पूजा षोडशोपचारेंसीं । श्रीरामें वृत्तांत अगस्तीसीं । विस्तारेंसीं सांगितला ॥६७॥ नमन करोनि अगस्तीसी । देव निघाले निजाश्रमासी । तयाउपरी श्रीरामें कुंभोद्भवासी[१] । नमन साष्टांगेंसी पैं केलें ॥६८॥ ऋषीस केला नमस्कार । अगस्तीनें केला आदर । फळ मूळ घेवोनि रघुवीर । सुख अपार पावला ॥६९॥ अगस्ति म्हणे श्रीरामासी । थोर भाग्यें आश्रमा आलासी । तुझिये प्राप्तीलागीं ऋषी । नाना सायास करिताती ॥७०॥ तुझिये प्राप्तीलागून । एकीं सेविलेंसे बन । एक करिती धूम्रपान । एक पंचाग्निसाधन साधिती ॥७१॥ एक झाले निराहारी । एक झाले चीरकृष्णाजिनजटाधारी । एक ते झाले फळाहारी । निराहारी पैं एक ॥७२॥ ऐसे तुझे प्राप्तीकरण । करिताती नाना साधन । तो तूं स्वभावें[२] दर्शन । आम्हालागून देतोसी ॥७३॥ श्रीरामा माझ्या प्रीतीलागीं । हीं उत्तम आभरणें लेई अंगीं । जयांचें तेज त्रिजगीं । बाणलिया प्रकाशे ॥७४॥ हीं उत्तम आभरणें जाण । विश्वकर्म्यानें केलीं निर्माण । तीं अंगीकारोनि आपण । विराजमान पैं व्हावें ॥७५॥ ऋषीची देखोनि परम प्रीती । संतोषोनियां श्रीरघुपती । आभरणें लेतां गगनीं दीप्ती[३] । तया तेजाची फांकली ॥७६॥ श्रीराम म्हणे कुंभोद्भवा । हीं आभरणें कोणाचीं कोणीं दिधलीं केव्हां । सविस्तर सांगें मुनिपुंगवा[४] । थोर आनंदेंकरोनी ॥७७॥ ऐकोनी दाशरथीचें वचन । बोलता झाला अगस्ति जाण । पूर्वी त्रेतायुगीचें कथन । ऐक सावधान श्रीरामा ॥७८॥ एका जनार्दना शरण । अगस्तिश्रीराम संवादकथन । श्रोते होवोनि सावधान । रामायण अवधारा ॥७९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामअगस्त्याश्रमगमनं नाम एकषष्ठितमोऽध्यायः ॥६१॥ ओंव्या ॥७९॥

## अध्याय बासष्टावा

॥ श्रीमहाविष्णवे नमः ॥

### अगस्ति-श्रीराम संवाद

कुंभोद्भव म्हणे जामदग्न्यजेत्यासी[५] । पूर्वी त्रेतायुगाची कथा ऐसी । जे वर्तली ते तुजपासीं । विस्तारेंसीं सांगेन ॥१॥ पूर्वी त्रेतायुगामाझारीं । शतयोजनें वनविस्तारीं । पशु पक्षी नाहीं त्या वनांतरीं । त्यजोनि दुरी गेले मानव ॥२॥ तया वनाभीतरीं । एक तापस उत्तम तप करी । मीही रामा हिंडत तेथवरी । तया वना प्रवेशलों ॥३॥ फळें मुळें सुस्वादिष्ट । भक्षितां प्राणी होय संतुष्ट । मार्गीं रमलियाचे कष्ट । तया वनीं निवारती ॥४॥ अनेक वृक्ष बहुत जातींचे जाण । तयांचे कोण करील वर्णन । तयांमध्ये एक सरोवर विस्तीर्ण । एकयोजनपर्यंत ॥५॥ तया सरोवराभीतरीं । नानापरींच्या कमळिणी भ्रमरी । रुणझुण करिती नाना स्वरीं । मंजुळ

**शब्दार्थ** - १. अगस्ती ऋषीला, २. सहज, ३. प्रकाश, ४. मुनिश्रेष्ठा, ५. परशुरामाचा पराभव करणाऱ्या श्रीरामचंद्रास.

शब्दें करोनी ॥६॥ हंस सारस चक्रवाक । मयूर साळया आणिक शुक । तित्तिर लाव्हे कुक्कुट[1] बक । कारंडक अनेक हो ॥७॥ तया वनींचें फळ । अत्यंत स्वादिष्ट रसाळ । आणि तेथील निर्मळ जळ । सेविल्या अपूर्व सुख होय ॥८॥ ते समयीं सरोवराभीतरीं । शव एक देखिलें तनु साजिरी । सरोवरातीरीं आश्रम रावणारी । उत्तम सुंदर देखिला ॥९॥

**सरोवराच्या काठावर पडलेले शव विमानातून आलेल्या पुरुषाने भक्षण केले :** शव देखोनि आश्चर्य वाटलें । मग तेथें क्षण एक मन स्थिर केलें । तंव तत्क्षणीं अद्‌भुत वर्तलें । तें अवधारीं श्रीरामा ॥१०॥ तंव एक स्वर्गीहून । उतरतां देखिलें विमान । घंटावळी रत्नखचित जाण । तेजें संपूर्ण लखलखित ॥११॥ तया विमानाभीतरीं । गंवर्धगायन सुस्वरीं । अप्सरानृत्यताल गजरेंकरीं । माजि सुंदर पुरुष बैसलासे ॥१२॥ तया पुरुषें तेथें उतरोन । करोनि करचरण-प्रक्षाळण । शव[2] भक्षिता झाला आपण । तें म्यां दृष्टीं देखिलें ॥१३॥ सवेंचि पुरुष विमानीं। आरूढ होतां तेच क्षणीं । म्यां पुसिले तू कोंण म्हणोनि । शव कां भक्षिलें विमानस्था ॥१४॥ अति निंद्य शवभक्षण । तुवां करावया काय कारण । तें मज सांगें विस्तारून । कृपा करोनि ये समयीं ॥१५॥ तूं अत्यंत सुंदर पुरुष । आणि भक्षिलें तुवां मांस । हें आश्चर्य देखिलिया मनास । पुसों इच्छितों तुजलागीं ॥१६॥ ऐकोनियां माझें वचन । विमानस्थ पुरुष बोलिला जाण । म्हणे मुनि होवोनि सावधान । सविस्तर कथन अवधारीं ॥१७॥

**श्वेताचे आत्मकथन :** पूर्वीं विदर्भदेशींचा भूपती । वसुदेव नामें महाख्याती । तयासि दोघी स्त्रिया निश्चितीं । दोघी पुत्रवती पैं झाल्या ॥१८॥ तो आमुचा पिता जाण । आम्ही दोघे बंधु धर्मपरायण । माझें श्वेत नामाभिधान । सुरस कनिष्ठ बंधु माझा ॥१९॥ राज्य करितां वसुदेवास । बहुत काळ लोटला मुनि परियेस । मज राज्यीं स्थापोनि राजा स्वर्गास । मरण पावोनि पैं गेला ॥२०॥ पित्यामागें म्यां श्वेतें । राज्य केले वर्षे बहुतें । मग उबगलों विषयभोगातें । उदास चित्तें होवोनी ॥२१॥ राज्यीं स्थापूनि कनिष्ठ बंधूसी । मी आलों या वनासी । तप केलें तीन वर्षे ऋषी । मग मी स्वर्गासी विमानारूढ होवोनि गेलों ॥२२॥ गेलियावरी ब्रह्मलोकातें । क्षुधतृषेनें बाधिलें तेथें । मग म्यां विनवोनि ब्रह्मयातें । पुसता झालों ते काळीं ॥२३॥ मग ब्रह्मा म्हणे महापुरुषा । तप करोनि अति सायासा । परी दान धर्म दया सहसा । घडलीं नाहीं तुजलागीं ॥२४॥ तुवां तप केलें अद्‌भुत । परी पूजिले नाहींत अतीत[3] । यालागीं क्षुधा तृषा बाधित । ये लोकीं जाण तापसा ॥२५॥ दानधर्मदयेवीण । मम लोका आलिया होय विघ्न । यालागीं भले साधुजन । अन्नदान करिताती ॥२६॥ तापसी म्हणे ब्रह्मयासी । मज भक्षावया काय देतोसी । येरू म्हणे तुझें शरीर पडलें भूमीसीं । तें भक्षावें स्वादिष्ठ ॥२७॥ मग विमानीं आरूढोन । या सरोवरा आलों जाण । स्वशरीर केलें भक्षण । तुजदेखतां अगस्तिमुनी ॥२८॥ आपुलें शरीर केलें भक्षण । येथे तृप्ति पावलों जाण । यावरी तुमचें झालें दर्शन । तृषेसि बोळवण[4] पैं झाली ॥२९॥ आता अहो जी अगस्तिमुनी । मज कृपा करावी दीनालागूनी । म्हणोनि माथा ठेविला चरणीं । काय विनवणी करिता झाला ॥३०॥ अहो कुंभोद्भवा इल्वलारी । हीं हेमाभरणें[5] अंगीकारीं । कृपा करोनि मजवरी । दीन म्हणोनि उद्धरावें ॥३१॥ हेमाभरणें अंगीकारून । तया दिधलें आशीर्वचन । म्हणे तूं स्वर्गा करीं गमन । क्षुधा तृषा जाण बाधेना ॥३२॥ मग माझे आशीर्वादेंकरीं । प्रवेशता झाला स्वर्गपुरी । त्याचीं आभरणें

---

शब्दार्थ - १. कोंबडे, २. प्रेत, ३. अतिथी, ४. तृप्ती, ५. सुवर्णालंकार.

हीं रावणारी । तुज म्यां दिधलीं ये काळीं ॥३३॥ तो पुरुष स्वर्गासीं । पूर्वदेह सांडोनि वनप्रदेशीं । दिव्यदेहें ब्रह्मलोकासी । विमानारूढ होवोनि गेला ॥३४॥ ऐकोनि अगस्तीचें वचन । संतोषला श्रीरघुनंदन । म्हणे स्वामी कृपा करून । तयाचें कथन सविस्तरीं सांगावें ॥३५॥ श्रीराम म्हणे अगस्तीसी । श्वेतराज वनप्रदेशीं । तप करितां सायासीं । वस्ती मनुष्यासी नव्हती तेथें ॥३६॥ ऐसें झालें उद्वस[1] वन । मृगपक्षिविवर्जित जन । महा विक्राळ दारुण । तेथें तप कैसें केलें ॥३७॥ भार्गवजेत्याचें ऐसें वचन । ऐकोनि अगस्ति आनंदोन । पूर्वील इतिहास पुरातन । संतोषोन सांगता झाला ॥३८॥

मनूची कथा : पूर्वी कृतयुगामाझारीं । मनुनामें प्रसिद्ध निर्धारीं । तया पुत्र इक्ष्वाकु नृपकेसरी[2] । पितयाचे आज्ञेअधीन असे ॥३९॥ मनु धर्मात्मा धर्मपरायण । पुत्रासी राज्यीं स्थापून । म्हणता झाला स्वधर्मेंकरून । राज्यपाळण करावें ॥४०॥ अदंड्या[3] दंड न करावा । न करीं अधर्माचा ठेवा । गोब्राह्मण आणिक जीवां । प्रतिपाळण करावें ॥४१॥ ऐसें बोलोनि मनूनें जाण । केलें स्वर्गाप्रति गमन । मागें इक्ष्वाकु प्रतापेंकरून । राज्य करिता पैं झाला ॥४२॥ पृथ्वीचे राजे जिंतिले । आपुले करोनि स्थापिले । पुढें चिंतातुर मानस झालें । पुत्रसंततीकारणें ॥४३॥ म्हणे म्यां पृथ्वी जिंतिली । स्वधर्मेंकरोनि प्रतिपाळिली । परी आपणासि संतति पाहिजे झाली । यदर्थीं[4] विचार करितसे ॥४४॥ स्वधर्मकर्मेंकरीं जाण । पुत्राचें करिता झाला जनन । तंव एकशत पुत्र झाले निर्माण । धर्मपरायण तेजस्वी ॥४५॥ सर्वांहूनि धाकटा पुत्र । दंडकनामें अति विख्यात । मूढ झाला अपंडित । अनर्थ अद्भुत करिता झाला ॥४६॥ दुर्बुद्धि पुत्र देखोन । इक्ष्वाकूनें शाप दिधला दारुण । दंडक झाला अति उद्विग्न । सांडोनि उद्धटपण शांतीतें पावला ॥४७॥ करी पित्याचे सेवेसी । संतोष मानसीं अहर्निशी । तव पिता संतोषोनि एके दिवसीं । काय करिता पैं झाला ॥४८॥ विंध्याद्रिशैलाभीतरीं जाण । इक्ष्वाकूनें दंडका राज्य देऊन । येरें शुक्राचार्य गुरु करोन । राज्यभार चालविला ॥४९॥ तया पर्वताचे पाठारीं[5] । दंडकें वसविली मधुमंतपुरी । जियेचे रचने त्रिभुवनामाझारीं । उपमेसी नाहीं आणिक ॥५०॥ तया नगरीचे ठायीं । वास करिता झाला पाहीं । पुढील कथेची नवायी[6] । सावध होवोनि अवधारिजे ॥५१॥

दंडकाची कथा : कोणे एके काळीं दंडक जाण । पारधी निघाला मृग लक्षोन । तंव भार्गवकन्या देखिली जाण । वनविहरण करीतसे ॥५२॥ ती लावण्याची पुतळी । कीं स्वर्गींची देवांगना सजली । उपमेलागी भूमंडळीं । दुसरी नाहीं तिजसारिखी ॥५३॥ ऐसी सुंदर सुकुमार । अनंतगुणगंभीर । हंसगती चालता चरणीं भ्रमर । परिवेष्टित भोंवतीं ॥५४॥ ऐसें तें दैत्यगुरुचें कन्यारत्न । देखोनि दंडका चेतला मदन । म्हणे तीस तूं कोणाची कोण । काय कारणें वनीं हिंडसी ॥५५॥ माझा मदनें जातो प्राण । अवां माझें करी[7] वरण[7] । येरी म्हणे राया मी पितयाअधीन । स्वतंत्रपण मज नाहीं ॥५६॥ या वनाचे प्रदेशीं राया । माझा पिता शुक्राचार्य । अनुष्ठान करितो त्याची तनया । अरजा ऐसें नाम माझें ॥५७॥ तो माझा पिता गुरू जाण । तूं तया मागें कन्यादान । न मागतां करिसी माझें ग्रहण । तें अनर्थ दारुण भोगिसी ॥५८॥ ऐकोनि तियेचें वचन । मंदबुद्धि दंडक जाण । बळें देवोनि आलिंगन । संभोगून सोडिली ॥५९॥ संभोगून तियेसी । दंडक आला निजनगरीसी । येरी मागें उसकाबुसकी । रुदन वनवासीं करिती झाली ॥६०॥ तंव झाला माध्यान्हकाळ । शुक्रें शिष्यांचा घेवोनि

शब्दार्थ – १. ओसाड, २. राजश्रेष्ठ, ३. निरपराध्याला, ४. ज्याकरिता, ५. पृष्ठभागावर, ६. नवल, ७. विवाह कर.

मेळ । क्षुधार्थी होवोनि वनफळें प्रबळ । भक्षावया येता झाला ॥६१॥ मार्गी रुदन करितां कन्येसी । देखता झाला देवऋषी[1] । म्हणे तूं कोणें गांजिलीसी । कां शोक करिसी सांग मज ॥६२॥ येरीनें सांगतां वृत्तांत । शुक्रे ऐकोनि क्रोधें उचंबळत । म्हणे दुष्टात्म्याने करोनि अकृत[2] । निजकन्येसी गांजिलें ॥६३॥

दंडकाला शुक्राचार्यांचा शाप : शुक्र शाप ते काळीं दारुण । देता झाला दंडका जाण । सप्त दिवसां सहराज्य आपण । निजसैन्येंसीं भस्मेल ॥६४॥ हें जें दंडकारण्य । धुई[3] दाटोन होईल दहन । पर्जन्य येथे न पडे जाण । बहुकाळ अवर्षणें जन पीडती ॥६५॥ ये वनीं कोणीं न करावी वस्ती । जाणोनि रहावें देशींच्या प्रांतीं । ऐसें ऐकोनि जनीं समस्तीं । त्या स्थळाचा त्याग केला ॥६६॥ कवीनें संबोखोनि कन्येसी । दंडकारण्यी स्थापून तिसी । देता झाला वरदानासी । आत्मजेसी ते काळीं ॥६७॥ अवो आत्मजे ये वनाभीतरीं । तुझ्या आश्रमा शाप व बाधी निर्धारीं । तू येथें राहें आनंदें निर्भरी । वनफळें सेवोनियां ॥६८॥ शुक्रे वनीं स्थापोन कन्यारत्न । आपण निजाश्रमा करी गमन । ऐसें अगस्तिमुखीं श्रीरामें ऐकोन । तंव सायंकाळ प्रवर्तला ॥६९॥ श्रीरामासहित अगस्तिमुनी । प्रवर्तले संध्यावंदनीं । निजकर्मे करितां रजनी । तिये काळीं पैं झाली ॥७०॥ एका जनार्दना शरण । श्रीरामें करोनि संध्यावंदन । मग करिते झाले भोजन । ते कथा पावन अवधारा ॥७१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां अगस्तिश्रीरामसंवादो नाम द्विषष्टितमोऽध्यायः ॥६२॥ ओंव्या ॥७१॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

## अध्याय त्रेसष्टावा

॥ श्रीपरमात्मने नमः ॥

### वृत्रासुरवधाची कथा

ऋषीची संज्ञा जाणोन । श्रीरामें स्नानसंध्या सारून । नंतर करावया भोजन । ऋषि राम प्रवर्तले ॥१॥ श्रीरामभोजनाकारणें । नानापरींचीं फळें तेणें । उत्तम शाका अगस्तीनें । श्रीरामालागीं आणिल्या ॥२॥ उत्तम फळें रुचिकर । भोजनीं प्रवर्तला राजेश्वर । भोजन करोनि श्रीरघुवीर । निजासनीं बैसला ॥३॥ तृणपर्णकुटिकेमाझारी । श्रीरामें निद्रा करोनि तमारी[4] । उदय होतां नृपकेसरी । स्नानसंध्या संपादिली ॥४॥ ऋषींस करोनि नमस्कार । हात जोडोनि श्रीरघुवीर । म्हणता झाला आजि भाग्य अपार । चरण तुमचे देखिले ॥५॥ आजि धन्य माझें कुळ । धन्य माझें भाग्य सफळ । जन्मोजन्मींचें तपाचें फळ । चरणयुगुल देखिलें ॥६॥ आतां निजनगरा जावयासी । आज्ञा दिधली पाहिजे ऋषी । ऐसें श्रीराममधुरवचनासी । ऐकोनि कुंभोद्भव बोलिला ॥७॥ आचमनीं प्राशिला अपांपती[5] । विंध्याद्रि निजविला क्षिती । ऐसा कुंभोद्भव रामाप्रती । काय बोलता जाहला ॥८॥ अगस्ति म्हणे श्रीरामा । तुवां वधोनि दुष्टात्मा । सुखसंतोष दिधला आम्हां । पावन अवनी[6] तुवां केली ॥९॥ सर्व भूतांचें दुःखकंद । जयांचे बंदीं सुर पावले बंध । ऐसा रावणकुंभकर्णांचा कुळासह वध । करोनि अमर सोडविले ॥१०॥ तुझा उपकार महापुरुषा । सहसा वर्णवेना शेषा । साही

---

शब्दार्थ – १. शुक्र, २. वाईट कर्म, ३. धूळ, ४. सूर्य, ५. समुद्र, ६. पृथ्वी.

दर्शनां[1] विवाद आपैसा । अद्यापि तुटला पैं नाहीं ॥११॥ ऐकोनि अगस्तीचें स्तवन । संतोषला धरणिजारमण । ऋषीस करोनि नमन । विमानारूढ पैं झाला ॥१२॥ हेममय पुष्पकविमानीं । आरूढोनि श्रीराम गगनीं । आज्ञा करितां पुष्पक अवनीं । अयोध्येचे उतरले ॥१३॥ ज्ञानकर्मेंद्रियांचा नाथ । तयाचा वेग राहिला तेथ । अंजनीभ्रतार लज्जान्वित । पुष्पकापुढें होवोनि ठेला ॥१४॥ श्रीराम आरूढोनि विमानीं । माध्यान्ह होतां अयोध्याभुवनीं । प्रवेशतां पुष्पका आज्ञापोनी । निजस्थानीं पाठविलें ॥१५॥ श्रीराम येवोनि सदना उजु । बैसोनि पाचारिले अनुजु[2] । भरतलक्ष्मण आनंदभोजु । अग्रजासी भेटले ॥१६॥ अग्रजानुजां झाली भेटी । स्वानंदें हेलावली सृष्टी । मग श्रीरामें बंधूंप्रति गोष्टी । सांगितली स्वकृत ते ॥१७॥ शूद्रजातीचा तापस । दक्षिणदिशे करी धूम्रपानास । तयातें वधोनि ब्राह्मणा संतोष । बाळ वांचवोनि दीधला ॥१८॥ आतां पुढील कर्तव्यता । ते तुम्ही ऐका एकाग्रचित्ता । आम्हीं केलें राक्षसांच्या घाता । हत्या बहुत घडल्या आम्हां ॥१९॥ करावया पातकाचें निर्दळण । करूं धर्माचें संरक्षण । आतां करूं अश्वमेधयज्ञ । राज्यरक्षण करावया ॥२०॥ ऋषिजनसुखसंतोषार्थ । मी अश्वमेधयज्ञ करीन येथ । ऐसें श्रीरामाचें मनोगत । जाणोनि भरत बोलता झाला ॥२१॥ भरत म्हणे श्रीरामासी । पूर्वी कोणें केलें यज्ञासी । तें मजप्रति सांगिजे विस्तारेंसीं । फलश्रुतीसीं रघुवीरा ॥२२॥ ऐकोनि कनिष्ठ बंधूचे वचन । बोलता झाला श्रीरघुनंदन । पूर्वी मित्रें[3] राजसूय यज्ञ करून । वरुणलोक पावला ॥२३॥ चंद्रें करोनि राजसूय यज्ञ । त्रैलोक्यींचें उत्तम स्थान । तें पावला शाश्वत स्थान । यालागीं कीं धर्मपालन करावें ॥२४॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन । भरतें उपक्रम करून । बोलता झाला स्वयें आपण । निजलक्षण धर्माचें ॥२५॥ भरत बोले श्रीरामासी । तूं त्रैलोक्याचा ईश होसी । स्वधर्मा प्रतिपाळ करावयासी । तुजहून आन[4] पैं नाहीं ॥२६॥ ब्रह्मा तुझे पोटींचें बाळ । इंद्रादि किंकरें प्रबळ । तुझी आज्ञा वंदी काळ । तूं दीनदयाळ श्रीरामा ॥२७॥ करितोसि अश्वमेध यज्ञ । यदर्थी[5] अशक्य नाहीं जाण । परी विचारिजे कार्यकारण । जीवा पीडण होय बहुत ॥२८॥ पृथ्वीतळींचे नृपवर । तयांसीं संग्राम करितां घोर । जीवमात्राची हिंसा अपार । यज्ञ करितां होईल ॥२९॥ अमृतोपम भरताचें वचन । ऐकोनियां धरणिजारमण । हांसोनि बोलता झाला आपण । स्वधर्मपाळण उत्तम जें ॥३०॥ भला भला राया भरता । तुजहूनि आन न देखें ज्ञाता । अश्वमेध करणें सर्वथा । माझ्या चित्ता गमतसे ॥३१॥ दंडकारण्यीं लंकाभवनीं । अगणित राक्षस पडिले रणीं । तया पापाची करावया खंडणी[6] । अश्वमेध यज्ञीं प्रवर्तावें ॥३२॥ पूर्वी देवेंद्र वृत्रासुर मारिला । ब्रह्महत्येचा डाग बैसला । अश्वमेध यज्ञ करिता झाला । पवित्र इंद्र तिहीं लोकीं ॥३३॥ श्रीरामभरतांचें वचन । ऐकोनियां लक्ष्मण । बोलता झाला सुखसंपन्न । वृत्राख्यान सविस्तर ॥३४॥ लक्ष्मण म्हणे बंधूंसी । पूर्वील इतिहास तुम्हांपासीं । सांगतसें विस्तारेंसीं । निजधर्मासी संरक्षण ॥३५॥

**वृत्रासुराची कथा :** वृत्रासुर यातीचा[7] ब्राह्मण । तीन शत योजनें शरीर उंच जाण । आडवें शतयोजन प्रमाण । लंबायमान दीर्घ जें ॥३६॥ ऐसा वृत्रासुर दीर्घशरीरी । परी स्वधर्में प्रजापाळण करी । अधर्म नाहीं राज्याभीतरीं । दीना कैवारी कृपाळु ॥३७॥ यथाकाळीं वर्षे पर्जन्य । पृथ्वी धनधान्यें परिपूर्ण । उदक सरोवरीं निर्मळ जाण । न आटे कदाकल्पांतीं

शब्दार्थ - १. पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा, वेदांत, २. धाकटे बंधू, ३. सूर्यानें, ४. दुसरा, ५. यासंबंधी, ६. परिहार, ७. जातीचा.

॥३८॥ राज्य करितां वृत्रासुरासी । कोणे एके काळीं अनुताप त्यासी । उपजोनियां निजराज्यासीं । पुत्र अधिकारी पैं केला ॥३९॥ तया पुत्राचें नाम मधुरेश्वर । अत्यंत तपी सज्ञान धर्मिष्ठ चतुर । राज्यीं स्थापोन तो निजकुमार । आपण तपा निघाला ॥४०॥ उत्तम तप करून । जिंतीन मी देवसदन । ऐसें कल्पोनियां वना प्रयाण । करिता झाला वृत्रासुर ॥४१॥ वनीं करोनि उग्र तपासी । हाहाभूत[1] इंद्र अमरगणेंसीं[2] । चिंतातुर होवोनि मानसीं । काय करिता पैं झाला ॥४२॥ सकळ सुरांसहित । इंद्र आला विष्णू जेथ । तयासि करोनि दंडवत । हात जोडोनि उभा ठेला ॥४३॥ इंद्र म्हणे विष्णूसी । कृपाळुवा वाक्य परियेसीं । वृत्रासुर दैत्यवंशीं । उग्र तप करितसे ॥४४॥ तयाचे तपेंकरून । हाहाभूत अमरगण । तेणें वश केले भूमंडळींचे जन । स्वर्गलोक घेऊं पाहतो ॥४५॥ तप करोनि उत्कृष्ट । प्राणिजना होताती कष्ट । मजहि पडलें भयसंकट । निवारिता श्रेष्ठ आहेसि तूं ॥४६॥ संसारभवगजापासून । सोडविता तूं जनार्दन । आणि उच्चारितां नामस्मरण । पातक भस्म होतसे ॥४७॥ तुझ्या भृकुटीचेनि प्रभावें । उत्पत्ति स्थिति होय स्वभावें । त्रैलोक्य उदरीं धरिलें देवें । थोर उदर करोनी ॥४८॥ तूं निर्गुण निराकार । निष्कर्म निरुपचार । अज[3] अव्यय[4] अक्षर[5] । श्रुतीसी पार न कळे तुझा ॥४९॥ या भूतसृष्टीची चिंता । तुजचि असे गा जगन्नाथा । आम्हां देवां तूंचि स्थापिता । उच्छेंदिता तूंचि पैं ॥५०॥ वृत्रवधाचिया कारणें । तुवां साह्य व्हावें जनार्दनें । ऐसीं करुणेचीं ऐकोनि वचनें । करुणाघनें पाहिलें ॥५१॥ सकळ देवांसहवर्तमान । इंद्राप्रति श्रीनारायण । बोलता झाला मधुर वचन । सावधान अवधारा ॥५२॥ विष्णू म्हणे देवांसी । माझा भक्त वृत्रासूर निश्चयेसीं । माझे हस्तें मृत्यु नाहीं जाण त्यासी । परी उपायासी सांगेन ॥५३॥ इंद्रहस्तें होय मृत्य । ऐसा उपाय करीन सत्य । माझें सामर्थ्य जें गुणातीत । त्याचा त्रिधा भाग करीन ॥५४॥ एक अंश शरीरीं । दुसरा अंश वज्राभीतरीं । तिसरा अंश पृथ्वीवरी । ये प्रकारीं विभागीन शक्ति ॥५५॥ वृत्रवधालागून । मी त्रिधा[6] होतों जाण । परी इंद्राचे हातें पावेल मरण । मी न मारींच तयातें ॥५६॥

**इंद्र-वृत्राचे युद्ध :** ऐसें ऐकोनि विष्णूचें वचन । वृत्रवधालागीं सिद्ध सुरगण । सकळांसहित इंद्र आपण । युद्धालागून प्रवर्तला ॥५७॥ पर्वतारीनें[7] वज्र घेवोनि करीं । जेथें वृत्र तप करी तेथवरी । येवोनि युद्धा पाचारिला वैरी । येरू गजरीं निघाला ॥५८॥ इंद्र आणि वृत्रासुर । युद्ध करिती घोरांदर । स्वर्गीं सकळ सुरवर । कौतुक पाहती दोघांचें ॥५९॥ दोघें झुंजती उसण्याघायीं । एकमेकांसी लोटती पाहीं । इंद्र वज्र घेवोनि ते समयीं । शिर दैत्याचें तोडिलें ॥६०॥ दैत्य पडोनि धरणीवरी । जैसा स्वर्गींचा कोसळला गिरी । रुधिर वाहे प्रवाह भारी । नदीसारिखा लोटला ॥६१॥ ऐसा होतां वृत्रासुरवध । झाला सकळांसी आनंद । परी इंद्रासी ब्रह्महत्येचा बाध । अति विरुद्ध लागला ॥६२॥ हीन दीन गेली कळा । मुकला वीर्यशौर्यमहाबळा । म्हणे ब्रह्महत्या आली माझिये कपाळा । थोर अवकळा इंद्रासी ॥६३॥ देशींचा गेला पर्जन्य । बहुकाळ पडिलें अवर्षण । भूतगणांसी न मिळे अन्न । प्राणिगण मरतें झाले ॥६४॥ इंद्र चंद्र पदापासून । च्यवोनि[8] झाले अति दीन । सकळही सुरवर मिळोन । श्रीजनार्दन प्रार्थिला ॥६५॥ देव म्हणती पुरुषोत्तमा । तुझेनि वरदें वधिलें अधमा । परी ब्रह्महत्या लागली न सोडी कर्मा । इंद्रालागीं स्वामिया ॥६६॥ इंद्र तंव निमित्तधारी । सृष्टींचा प्रतिपाळ

---

शब्दार्थ – १. भयग्रस्त, २. देवांसह, ३. जन्मरहित, ४. विकारशून्य, ५. अविनाशी, ६. तीन प्रकारचा, ७. इंद्राने, ८. भ्रष्ट होऊन.

तुझा तूंचि करीं । तूंचि एक चराचरीं । त्रैलोक्यासी आधार ॥६७॥ इंद्र ब्रह्महत्येपासून । सोडवावा कृपा करून । ऐसें देवांचें ऐकोनि वचन । काय करिता जाहला विष्णु ॥६८॥

**ब्रह्महत्यादोषनिवारणार्थ अश्वमेध :** विष्णु म्हणे देवांसी । ब्रह्महत्या नासे त्या उपायासी । इंद्रें करावें अश्वमेधासी । मजप्रीत्यर्थ जाण पां ॥६९॥ मजप्रीत्यर्थ करील यज्ञ । तरी पावेल निजस्थान । ब्रह्महत्येचें होईल दहन । पुण्यपावन तिहीं लोकीं ॥७०॥ ऐकोनियां विष्णूचें वचन । सकळ सुरवर मिळोन । जेथें इंद्र होता आपण । तया वना पातले ॥६१॥ देवीं शचीपति देखिला कैसा । हीन दीन पिशाच जैसा । इंद्रा सावध करोनि सहसा । अमरावतीये आणिला ॥७२॥ इंद्र आणोनि अमरावतीसी । देवीं करोनि अश्वमेधासी । यज्ञ संपविलिया समयासी । ब्रह्महत्या पुढें उभी राहिली ॥७३॥ ब्रह्महत्या म्हणे देव हो । मज कोठें वस्तीसी नेमिला ठावो । मीं इंद्रा सोडूनि कोठें राहों । कोणकोणत्या स्थळाप्रती ॥७४॥ देव म्हणती ब्रह्महत्येसी । तुवां व्हावें चतुर्भागेंसीं[1] । मग विभागिते झाले देव ऋषी । तें सर्वही अवधारा । ॥७५॥ चतुर्मासीं पडे पर्जन्य । तेणें नदी उंचबळे पूर्ण । तें जाण तुझें राहतें स्थान । दुसरें स्थळ अवधारीं ॥७६॥ तारुण्ययौवनें मुसमुसीं कांता । तेथें त्वां रहावें दिनत्रय सर्वथा । रजोदर्शनीं ब्रह्महत्या । दुसरा ठाव हा तुझा ॥७७॥ तिसरे वस्तीचें स्थान । भूमीवरी उखिरडीं[2] राहून । सर्वकाळीं सर्वदेशीं जाण । भूमि सोडून नव जावें ॥७८॥ चवथी वस्ती पापिष्ठांचें ठायीं । जे कां विमुख नामीं पाहीं । नरदेहा येवोनि भुललें विषयीं । सर्व काळ वस्ती तेथें तुझी ॥७९॥ ऐसी ब्रह्महत्या चहूं प्रकारीं । वांटोनियां सुरवरीं । इंद्रासि करोनि राज्याधिकारी । अमरावतीसी स्थापिला ॥८०॥ शैलारी अमरपदीं विराजमान। राज्य करी सुखसंपन्न । पुढे वर्तलें तें कथानुसंधान । श्रोते जन अवधारा ॥८१॥ एका जनार्दना शरण । इंद्रासी देवोनि इंद्रासन । देव झाले स्वानंदें पूर्ण । पुढील चरित्र गोड असे ॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां वृत्रासुरवधो नाम त्रिषष्टितमोऽध्यायः ॥६३॥ ओंव्या ॥८२॥

## अध्याय चौसष्टावा

॥ श्रीकमलाकांताय नमः ॥

### ऐल राजाची कथा

ऐसी शक्रारिहत्यांची कथा । अति आश्चर्य अपूर्वता । ऐकोनियां समस्तां । झाला बोलता श्रीराम ॥१॥ होवोनि आनंदभरित । बोलावयाचा उपक्रम करित । पूर्वी कर्दम प्रजापतीचा सुत[3] । ऐलनामें प्रसिद्ध ॥२॥ तेणें भुजबळेंकरून । पृथ्वीचें नृप जिंतोन । स्वधर्मे राज्य करी जाण । प्रजापाळण पुत्रापरी ॥३॥ आंगवण सुरेशाहुनि आगळी । उदारते न तुळती कर्ण बळी । दैत्य दानवें भेणें पाताळीं । लंघोनि गेली तळातळा ॥४॥ नाना गंधर्व असुर । भेणें पूजिती नृपेश्वर । रायाचा पराक्रम देखोनि थोर । चरणा शरण अरी येती ॥५॥ तो कोणे एकेकाळीं पारधीलागून। ससैन अटवी[4] प्रवेशोन । मृगां मारोनि लक्षावधि जाण । आणी श्वापदें नेणों किती ॥६॥ जिकडे जाय सेनासैन्य । तिकडे होय रणकंदन । पारधी खेळतां उमारमण । त्या स्थळाप्रति आले ॥७॥ तया वनाचे प्रदेशीं । कर्पूरगौर पार्वतीसीं । विचरतां देखोनि राजसैन्यासी । शाप महेशें दिधला ॥८॥ या वनाचे ठायीं जाण । पार्वतीमहेशां-वेगळेंकरून । वनीं विचरती प्राणी भूतगण । पुरुष स्त्रीदेहीं पैं होती ॥९॥ ऐसा शाप त्या

---

**शब्दार्थ –** १. चार प्रकारांनी, २. माळजमिनींवर, ३. मुलगा, ४. अरण्य.

वनासी । होतां कर्दमपुत्र सैन्येंसीं । स्त्रीरूप झाला पालट अवयवांसी । निश्चयेंसीं देखते झाले ॥१०॥ स्त्रीरूप सकळ सैन्य । देखोनि राजा दुःखित जाण । जेथें पार्वतीसहित त्रिनयन । तेथें कर्दमपुत्र स्वयें आला ॥११॥ करोनि कामांतकाची[1] स्तुती । अति नम्र विनीतवृत्तीं[2]। प्रसन्न झाला उमापती । बोलतसे ते समयीं ॥१२॥ अगा ये कर्दमसुता तुजलागोन । मी प्रसन्न झालों माग वरदान । तंव येरें पार्वतीचें स्तवन । साष्टांग नमनी पैं केलें ॥१३॥ दोघे झालिया प्रसन्नभूत । राजा झाला बोलत । तुमचें हे वन होय सत्य । मज पुरुषत्व प्राप्त होवो ॥१४॥

ऐलाला एक महिना स्त्रीत्व व एक महिना पुरुषत्वाच्या प्राप्तीचा वर : एक मास स्त्री एक मास पुरुष जाण । ऐसा वर द्यावा कृपा करून । मग महेश म्हणे धन्य धन्य । उत्तम वरदान मागितलें ॥१५॥ अर्ध वरद महेशाचें । अर्ध वरदान पार्वतीचें । हें तुज दिधलें सत्य साचें । अनुमानातें[3] धरूं नको ॥१६॥ ऐसें देवोनि वरदान । पुन्हा बोले उमा वचन । मागील नव्हे आठवण । सत्य जाण राजेंद्रा ॥१७॥ कर्दमपुत्रा मासपर्यंत । पुरुषत्व झालें प्राप्त । दुसरे मासीं योषिता[4] अद्भुत । लावण्यें महा साजिरी ॥१८॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणभरतांसी । कर्दमपुत्राची कथा ऐसी । वनीं विचरतां शाप त्यासी । महेशाचा पैं झाला ॥१९॥ ऐसें हे दिव्य आख्यान । ऐकोनि बुद्धि विस्मय पावोन । श्रीरामाप्रति कर जोडून । विनंती करिते झाले दोघे ॥२०॥ पुढें कर्दमसुताचें वर्तमान । श्रीरामा अधिक विस्तरोन । सांगावें जी कृपा करून । पुढती नमन करिते झाले ॥२१॥ ऐलराजा स्त्रीदेह पावोन । वर्तत कैसा वनोवन । ऐसें हें उत्तम कथन । सविस्तर श्रीरामा सांगावें ॥२२॥ ऐकोनि भरतलक्ष्मणांचा प्रश्न । सांगता झाला ऐलाख्यान । श्रोते होवोनि सावधान । रम्य रामायण अवधारा ॥२३॥ ऐलराजा प्रथममासीं । पावोनियां स्त्रीदेहासी । सर्वे सेना स्त्रीरूपेंसीं । विचरतसे वनोवन ॥२४॥ तया अरण्याभीतरीं । राजा होवोनि सुंदरीं । तिच्या लावण्याची परी[5] । श्रोतीं सावध ऐकावी ॥२५॥ मुखकमळ अति सुंदर । कमळदळासारिखे नेत्र । कुच अवयव देखोनि ऋषीश्वर । मदनें मुरकुंड्या पडिल्या पैं ॥२६॥ सेना स्त्रीरूपेंसीं समस्त । हस्तीवरी आरूढोनि तेथ । ऐल विचरतां विपिनाआंत[6] । तंव सोमसुत बुध तेथें असे ॥२७॥ चंद्रसुत बुध अनुष्ठान । तये वनीं करी जाण । तयाचे आश्रमासमीप येतां पूर्ण । एक सरोवर देखिलें ॥२८॥ सेनेसहित सरोवरीं । ऐल प्रवेशला उदकाभीतरीं । क्रीडा करोनि बाहेरी । किंचित्सेंवकेसीं[7] निघाला ॥२९॥ करीं शोभे धनुष्यबाण । सर्वे सेवक चवघे जण । ऐसें बुधें देखोनि आपण । मदनें विव्हळ पैं झाला ॥३०॥ बुध म्हणे तियेच्या सखियांसीं । तुम्हांत ही सुंदर कोण रूपयौवनेंसीं । लावण्य पाहतां पृथ्वीसीं । हीसमान दुजी नाहीं ॥३१॥ हिचें देखोनि लावण्य । सुरनरकिन्नरां काम गहन । इचा भ्रतार आहे कोण । काय कारण विसंबला ॥३२॥ ऐसं ऐकोन बुधाचें वचन । ऐलरायाच्या दूतीं जाण । सांगों आदरिलें समूळ कथन । सावधान अवधारा ॥३३॥ अहो आमुचा प्रभु निश्चितीं । याची सेना सेवक संपत्ती । सर्वां शापें पावली स्त्रीत्वप्राप्ती । हें नवल मुनि येथें झालें ॥३४॥ अहो जी मुनि या वनाभीतरीं । पुरुष आहेत कीं नाहींत निर्धारीं । आमचे प्रारब्धाची नवलपरी । स्त्रीरूप होवोनियां ठेलों ॥३५॥ या पर्वताच्या माथां जाण । बहुसाल पुरुष असती जन । परी आमचें प्रारब्ध असे हीन । योषिता करोन ठेविलें ॥३६॥ मुनि म्हणे तयांसी । तुम्ही विचरां या वनप्रदेशीं । कीं पुरुष त्यांचे सेवेसी । करोनि सावकाशीं

शब्दार्थ - १. मदनांतक शंकराची, २. नम्रतापूर्वक, ३. संशय, ४. स्त्री, ५. प्रकार, ६. अरण्यांत, ७. थोड्या दूतांसह.

वसावें ॥३७॥ ऐसें सोमसुतें[1] बोलोन । तंव समीप ऐला आली जाण । बुधासि साष्टांगें करोनि नमन । कर जोडोन उभी असे ॥३८॥ इंदुसुत[1] म्हणे कमलनयने । सुभगे सुंदरे चंद्राननें । तुज देखिल्या भूकतहाने । सर्व विसरिजे राजबाळे ॥३९॥ मी चंद्राचा सुत जाण । मज वरावें स्वइच्छेकरून । ऐसे ऐकोनि बुधाचें वचन । ऐला काय बोलिली ॥४०॥ चहूंकडे पाहे सखीजनांसी । तंव कोणी न दिसे निर्भयेंसी । नि:शंक निर्लज्ज होवोनि मानसीं । वचन त्या बुधासी बोलती झाली ॥४१॥ अगा ये सुंदरा सोमसुता । अत्यंत सज्ञाना गुणवंता । मज अभय देईं आतां । मी तुझी कांता होतसें ॥४२॥ ऐकोनि तियेचें वचन । संतोषला सोमनंदन[1] । तये वनीं किंचिद्दिन[2] । उभयतां क्रीडा करित होतीं ॥४३॥ तंव कोणे एके समयीं माधव[3] मास[3] । घेवोनि सुंदर ऐलेस । बुधु क्रीडतां होवोनि संतोष । आनंदा दोघे पावोनि भूपती । बुधासि म्हणता झाला सेनासंपत्ती । कोठे गेली माझी मुने ॥४५॥ तंव इंद्रसुत म्हणे रायासी । ऐकें सावध परियेसीं । तुम्हीं निद्रित असतां सेजेसीं । मेघ वर्षला ॥४६॥ शिळांचा पर्जन्य वर्षला शिळावारीं । सैन्या झाली चकचुरी । तुज असतां मम आश्रमाभीतरीं । प्राण वांचला राजेंद्रा ॥४७॥ राजा म्हणे बुधासी । माझा पुत्र शशिबिंदु नामेसीं । राज्य करितो आपुले देशीं । मी सैन्येंसीं भ्रष्टलों ॥४८॥ आतां त्यजीन आपुला प्राण । एकला वांचल्या फळ कोण । राज्यासि आतां सैन्येंवीण । दु:ख दारुण होतसे ॥४९॥ येरु म्हणे तुवां रहावें स्वस्थचित्तें । सांडोनि सैन्यचिंता येथें । फळमूळ भक्षोनि दिवस किंचितें । पुढे हित करीन तुझें ॥५०॥ ऐकोनि सोमसुताचें वचन । राजा ऐल आश्रमीं राहोन । पूर्णमास भरतां जाण । स्त्रीरूप धरिता जाहला ॥५१॥ धरोनियां स्त्रीरूपासी । बुध ऐल क्रीडतां वनासीं । पुत्र झाला पुरूरवा नामेंसीं । अति प्रसिद्ध धर्मात्मा ॥५२॥ सोमसुतापासोनि संभूत[4] । ऐलेसि पुरूरवा झाला सुत । पुढील कथा सुनिश्चित । सावचित्त ऐकावी ॥५३॥ एका जनार्दना शरण । पुढील कथा अति गोड निरूपण । श्रोता वक्ता श्रीजनार्दन । श्रीरामरामायण जाण तेथें ॥५४॥

स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां ऐलाख्याने चतु:षष्टितमोऽध्याय: ॥६४॥ ओंव्या ॥५४॥

## अध्याय पासष्टावा

॥ श्रीमहाविष्णवे नम: ॥

### अश्वमेध यज्ञ व लवकुशांचे गायन

श्रीराम म्हणे लक्ष्मणभरतांसी । कर्दमपुत्रकथा ऐसी । पुढें वर्तलें तें सावकाशीं । अवधानेंसी अवधारा ॥१॥ ऐलाबुधांपासून । पुरूरवा पुत्र झाला जनन । तदनंतर बुध सज्ञान । काय करिता पैं झाला ॥२॥ पाचोरोनि सर्व मुनी । च्यवन भृगु तपोधनी । पुलस्त्यादि श्रेष्ठ ब्राह्मणीं । ॐकार[5] वषट्कार[5] पैं आले ॥३॥ सोमसुत म्हणे ऋषींसी । परिसा कर्दमऋषीच्या पुत्रकथेसी । ऐलनामें स्वधर्मेसीं । राज्य करित पराक्रमें ॥४॥ तो आला या वना पारधीसी । सैन्येसहित महादेवें शाप त्यासी । दिधला असतां त्याच्या हितासी । तुम्ही समस्तीं विचारा ॥५॥ ऐकोनि सोमसुताचें वचन । ऋषीश्वरां संतोष अति गहन । समस्त एकवट मिळोन । बोलावया उपक्रम करिते झाले ॥६॥ ऋषी म्हणती बुधासी । पार्थिवाचे[6] उ:शापासीं । करावें

शब्दार्थ – १. बुधाने, २. काही दिवस, ३. वैशाख महिना, ४. उत्पन्न, ५. देवताविशेष, ६. राजाचे.

अश्वमेध यज्ञासी । तृप्त सुरवरांसी करूनी ॥७॥ हेचि एक कर्तव्यता। अवश्य करावें चंद्रसुता । या पुण्यासी नाहीं समता । विचारितां त्रैलोक्यीं ॥८॥ ऐसें ऋषीश्वरांचें मधुर भाषण । ऐकोनि समस्तीं संतोषोन । महादेवाप्रीत्यर्थ यज्ञ । करिते झाले ते काळीं ॥९॥ संवर्तकादि मुनिश्रेष्ठ । अति सज्ञान कर्मनिष्ठ । तयांतें पाचारोनि स्पष्ट । यज्ञ वरिष्ठ आरंभिला ॥१०॥ यज्ञसमाप्तीचें अंतीं । येवोनियां गिरिजापती । म्हणता झाला सोमसुताप्रती[१] । धन्य धन्य हिमकरात्मजा[१] ॥११॥ धन्य येथींचे ब्राह्मण । धन्य बुधाश्रमासमीप यज्ञस्थान । धन्य तुमचा भावार्थ[२] देखोन । प्रीतिप्रसन्न[३] मी झालों ॥१२॥ प्रसन्न झालीं पार्वतीपरमेश्वर। सोमसुत मागता झाला वर । कर्दमप्रजापतीचा ऐल कुमर । शापावेगळा करावा ॥१३॥ ऐल हा कर्दमसुत । शापापासोनि करावा मुक्त । महादेव म्हणे सत्य सत्य । शापनिर्मुक्त नृप केला ॥१४॥ शापावेगळा झाला पृथ्वीपती । आपुलिया निजस्थाना जाती । समस्त ऋषी आणि पार्वतीपती । मागें बुधें काय केलें ॥१५॥ प्रतिष्ठान नामें नगर । कर्दमसुतासी वस्तीसी थोर । वसवोनियां राजेश्वर । राज्यीं ऐल स्थापिला ॥१६॥ ऐसें कर्दमसुताचें आख्यान । श्रीरामें बंधूंसी सांगोन । लक्ष्मणाप्रति पुनरपि वचन । बोलता झाला रावणारी ॥१७॥

**अश्वमेधाच्या पूर्वतयारीला प्रारंभ :** वसिष्ठ वामदेव जाबाली । कश्यपादिकरानि ऋषिमंडळी । पाचारीं बा शीघ्रकाळीं । आणि नृपवर पृथ्वीचे ॥१८॥ धोडा आणावा सुंदरवदन । सर्वांग शुभ्र श्यामकर्ण । सुलक्षणीं विराजमान । देखतां मन निवे जनांचें ॥१९॥ ऐसें राघवें बोलिल्यावरी । शीघ्र लक्ष्मणें ते अवसरीं । दूत पाठवोनि त्वरेंकरीं । समस्त ऋषी पाचारिले ॥२०॥ आले कोण कोण ऋषीश्वर । तयांची नामें सविस्तर । श्रोते होवोनि सादर । सावधान परिसावीं ॥२१॥ ज्याची आज्ञा परम लाठी[४] । रविमंडळीं तपे छाटी[५] । धाकें कृतात[६] न उघडी दृष्टी । तो वसिष्ठ जगजेठीं स्वयें आला ॥२२॥ तदनंतरें वामदेव । आला जयाचा सर्वभूतीं भगवद्भाव । आत्मत्वें सृष्टि न्याहाळी सर्व । चराचरीं देखे हरिरूप ॥२३॥ जाबाली महातपोधन । वेदशास्त्रीं महानिपुण । तोही श्रीरामदर्शनालागून । शिष्यांसहित पैं आला ॥२४॥ कश्यपें नवी सृष्टि केली । अत्रीनें दुष्काळीं प्राणिरक्षा केली । अगस्तीची ख्याति आगळी । अनागत[७] भाष्य वदला जो ॥२५॥ विश्वामित्रासि गायत्री प्रसन्न । तपोबळें सृष्टि करी निर्माण । नारदही तेथें आला जाण । ब्रह्मवीणा घेवोनि खांदी ॥२६॥ आणिक अगणित ऋषीश्वर । आले ॐकार वषट्कार । आणि पृथ्वीचे राजे थोर । श्रीरामदर्शना पैं आले ॥२७॥ तदनंतरें हरिवाहिनी[८] । शीघ्र आली आज्ञेकरोनी। तयांची नामें परिसावीं कानीं । ऐसें श्रोतेजनां वाटतसे ॥२८॥ सुग्रीव अंगद नळ नीळ । पनस केसरी तरस तरळ । हेमकूट गज गवाक्ष प्रबळ । अरिदळणीं समर्थ जे ॥२९॥ आला हनुमंत वायुसुत । बिभीषण राक्षसपंडित । सनातन जाबंवंत । निजदळेंसीं तो आला ॥३०॥ आला सुषेण वैद्यराज । जो कां चतुराननाचा आत्मज । अयोध्येसि राघवानुज । आला निजचमूसीं ॥३१॥ आले भट्ट पौराणिक । शास्त्रज्ञ पंडित ज्योतिषी गणक । आले नटनाटक । मंत्रधारक ॐकार ॥३२॥ आले भाट नागरीं । आले देशमुख चौधरी । जे ब्राह्मण राष्ट्राभीतरीं । तेही आले अश्वमेधा ॥३३॥ श्रीरामें समस्तां देखोनि मान । केलें अर्घ्यपाद्यादिपूजाविधान । वस्त्रें भूषणें नाना देऊन । निजासनीं बैसविलें ॥३४॥

---

शब्दार्थ – १. बुधाला, २. भक्ती, ३. भीतीनें संतुष्ट, ४. मोठी, ५. लंगोटी, ६. यम, ७. पुढील, ८. वानरसेना.

श्यामकर्ण घोड्याचे वर्णन : तदनंतर श्यामकर्ण वारू । पृथ्वीवरी नव्हे स्थिरू । मनोवेगाचा लंघोनि पारू । सगुण सुंदर आणिला ॥३५॥ या अश्वाचें करितां वर्णन । चतुरानना पडे मौन । तेथें मी बापुडें अपुरतें दीन । केंवी मज वर्णन करवेल ॥३६॥ करोनियां दीक्षास्नान । वारूसी पूजी रघुनंदन । तया वारुवापुढें पवन । लज्जायमान शंकित ॥३७॥ रत्नमेखळा वारूचें कंठीं । कस्तूरी चंदन ललाटीं । केशराची शोभे उटी । देखतां दृष्टी मन निवे ॥३८॥ कंठी नवरत्नांचें भूषण । पीतांबर पांघरूण । चरणीं नुपुरें करिती गर्जन । देखतां मन पैं निवे ॥३९॥ क्षराक्षरातीत अक्षरीं । पत्रिका लिहिली साजिरी । जो क्षत्रिय होईल तेणें निर्धारीं । वारू धरोनि युद्ध कीजे ॥४०॥ दिसे वारू वोतींव । मान कळायुक्त कांतींव । रोम[१] मृदु अति अपूर्व । देहीं बिंबें उमटती ॥४१॥ ऐसा श्यामकर्ण वारू । तेजें जैसा हिमकरू । अलांछन अति सुंदरू । पाय स्थिरू नव्हे ज्याचा ॥४२॥ इंद्रनीळाहूनि आगळें[२] । दिसती अंबकाचीं[३] बुबुळें । माणिक रंगावरी सोज्ज्वळें । ऐसीं रत्नें जडियेलीं ॥४३॥ ऐसे तयाचे नयन । सप्तविंशति भोवरें पूर्ण । अश्वाचा वर्ण कोण । सावधान अवधारा ॥४४॥ सर्वांगवर्ण माणिकाचा । अंजनवर्ण श्रवणाचा । इंदुश्वेत ललाटींचा । तेजें दशदिशा उजळल्या ॥४५॥ आननीं श्रीजांबूनदाची[४] । परिवेष्टित प्रभावळी हिऱ्यांची । आंदुवांवरी नवरत्नांची । चरणीं घागऱ्या वाजती ॥४६॥ चरणीं पंधरयाचीं[५] नुपुरें । डोलतां वाजत अति गजरें । हय आपुले नटकारें । आकाशपुत्र स्थिर करी ॥४७॥ आपुली भाषा वदे वारू । हिंसे तेणें नाद थोरू । गर्जूं लागती सातही समुद्रू । ऐसा अश्व रावणारीचा ॥४८॥ पालाणिला अपूर्व भारी । रत्नें जडलीं हारोहारीं । गळां नवरत्नांची सरी । मुकुटीं बांधिली पत्रिका ॥४९॥

रामाज्ञेची पत्रिका : पत्रिके ऐसें लिहिलें ऐका । जो धनुर्धर असेल निका । तेणें वाचोनियां पत्रिका । मग वारू धरावा ॥५०॥ अश्व धरावा बळियाढें[६] । संग्राम करोनि सोडूं पुढें । ऐसा वारू देखोनि तपोधन गाढे । बहुत सुख पावले ॥५१॥ सर्व धनाचिया मांदुसा[७] । तिळजवांचे पर्वत सहस्त्रशा । घृताच्या कावडी अगणित सहसा । वस्त्रें अनुपम्य आणिलीं ॥५२॥ कोट्यनुकोटि गोधनें । तेल उडीद परिमळद्रव्यें गहनें । पूगीफळें दिव्यें पानें । आणिक सामग्री नेणों किती ॥५३॥ सामग्री देखोनि श्रीरघुवीर । भरतलक्ष्मणां आनंद थोर । यज्ञ करावया स्थळविचार । करिते झाले ते काळीं ॥५४॥ सुवर्णाची करोनि जानकी । दीक्षेकारणें केली निकी । तें देखोनि आठवली पद्माक्षी । श्रीरामासी ते काळीं ॥५५॥ मोहें कळवळलें मन । सद्गदित झाला रघुनंदन । तंव ऋषीश्वरां जाणवली खूण । आशीर्वाद देते झाले ॥५६॥ जानकी आणि पुत्रांसहित । अयोध्येसि राज्य कराल सत्य । हें ऐकोन ऋषिभाषित । संतोषयुक्त श्रीराम ॥५७॥

नैमिषारण्यात यज्ञाचे स्थळ निश्चित : यज्ञभूमि पहावया रघुनंदन । निघाला सर्वे तपोधन । आणि सेनासहित बंधुजन । नटनाटक निघाले ॥५८॥ भाट नगरीं नृत्यकारी । वीणा वेणु वाद्यें नानापरी । प्रवेशले नैमिषारण्यक्षेत्रीं । गोमतीतीरीं स्थळ नेमिलें ॥५९॥ सांगातें[८] तिघी जणी माता । अंत:पुरस्त्रिया समस्ता । आणि नगरयोषिता । नैमिषारण्या आणिल्या ॥६०॥ श्रीराम म्हणे भरतासी । याचकाचे इच्छेनिसीं । जें जें पाहिजे जयासी । या समयासी ते दीजे ॥६१॥ याचकाची इच्छा पूर्ण । तितुकें आपण द्यावें धन । मग काय करता झाला रघुनंदन । ते सावधान परियेसा ॥६२॥ तंव राष्ट्रींचे भूपाळ । घेवोनि आपुलालें दळ । नैमिषारण्या आले

शब्दार्थ – १. केश, २. अधिकतेते, ३. नेत्रांची, ४. सोन्याची, ५. वायू, ६. वीराने, ७. पेट्या, ८. बरोबर.

सकळ । अश्वमेध पहावया ॥६३॥ श्रीरामें पूजोनि ब्राह्मणभूपाळ । वस्त्रें भूषणें देवोनि सकळ । सुखी केलें त्रैलोक्य प्रबळ । स्वानंदें ऋषी बोलते झाले ॥६४॥ ऋषी म्हणती पूर्वी यज्ञ । ऐसा कोणीं न केला जाण । देवोनियां बहुत धन । बंदिजन सुखी केले ॥६५॥ लक्ष्मणाचे सांभाळीं[१] करूनि वारू । भरताचे स्वाधीन राजोपचारू । आणि दातव्य धन वस्त्रें अलंकारू । यांचें आधिपत्य पैं केलें ॥६६॥ शत्रुघ्नासी सांगितलें कार्य थोर । राजे ऋषी ब्राह्मण यांचा आदर । गंधाक्षता तांबूल इतर उपचार । अन्नपान पैं दीजे ॥६७॥ ऐसा नैमिषारण्यीं सोहळा । करी श्रीराम घनसांवळी । सुखें असतां त्रैलोक्या सकळा । पुढें काय वर्तलें ॥६८॥ नैमिषारण्यींच्या क्षेत्रीं । श्रीराम ऋषीसहित आनंदस्थितीं । यज्ञ करितो ऐसें वाल्मीकाप्रती । जाणवलें ते काळीं ॥६९॥ सवें घेवोनि दोघे कुमार । सुलक्षणीं सुंदर रूपधर । येता झाला वाल्मीक ऋषीश्वर । फळसंभार घेवोनी ॥७०॥ येतां दुरोनि देखिला यज्ञ । अद्भुत जयाचें पुण्य गहन । करितां ब्रह्महत्या होय दहन । दर्शनें जन उद्धरती ॥७१॥

वाल्मीकींनी लव-कुशांना यज्ञस्थळी जाऊन रामायणाचे गायन करण्यास सांगितले : तया नैमिषारण्याचे एकांतस्थळीं । वाल्मीक राहिला गुप्त जवळी । तया बाळकांप्रति ते काळीं । संवाद करिता पैं झाला ॥७२॥ तुम्ही दोघे मिळोन । जावें जेथें होतो यज्ञ । तेथें ऋषींप्रति शतकोटि गहन । रामायण वाचावें ॥७३॥ गावें ऋषींचे आश्रमस्थळीं । गावें जेथें तेथें भूपांजवळी । गावें जेथें ब्राह्मणमंडळी । ऋत्विजांसमीप पैं गावें ॥७४॥ गावें श्रीरामाचें भवनीं । गावें राया भरताचे सदनीं । गावे जेथें बहुत मिळणी । योषितांची असेल ॥७५॥ सर्वे फळेंमूळें घेऊन । भक्षण करोनि करा गायन । कोणाचें द्रव्य न घ्यावें आपण । वनवासीं प्रयोजन नाहीं त्यासी ॥७६॥ द्रव्यलोभ न करून । निर्लोभ दोघे करा कीर्तन । श्रीराम पुसेल तुम्ही कोण । सांगा शिष्य वाल्मीकाचे ॥७७॥ स्वरयुक्त करा कीर्तन । मूर्च्छना[२] मंजुळ कंपित गायन । आलाप भार्यांसहवर्तमान[३] । तालनृत्यसहित पैं ॥७८॥ इतुकें करावें प्रात:काळीं । येरीं आज्ञा वंदोनि निढळीं । वाल्मीक म्हणे तयांजवळी । श्रीराम जनक जगाचा ॥७९॥ उत्पत्ति स्थिति प्रळण जाण । हें जग श्रीरामा पासून । लय पावतां श्रीरामीं मग्न । सत्य स्वयें मी जाणें ॥८०॥ ऐकोनि वाल्मीकाचें वचन । संतोषले दोघे जण । हर्षयुक्त झाले मन । आज्ञा वंदोनी गुरुची ॥८१॥ नैमिषारण्या समीपतेसीं । वाल्मीकासहित क्रमिली निशी । प्रभाते उठोन स्नानसंध्येसी । दोघे वीर करिते झाले ॥८२॥ करोनियां संध्यास्नाना । वाल्मीकां करोनि प्रदक्षिणा । दोघे कैसे शोभले जाणा । चंद्रसूर्यांसारिखे ॥८३॥

त्या दोघांचे वर्णन : चंद्रगिरी द्रोणागिरी । जैसे शोभती दुग्धार्णवतीरीं[४] । तैसी शोभा दोघां कुमरीं । धगधगीत हुताश जैसे ॥८४॥ आधींच सूर्यवंशी वीर । दोघे प्रतापाचे सागर । दोघे दिनकरवंशींचे कुमर । वीरश्रृंगार करिते झाले ॥८५॥ आंग्या ल्याले दोघे अंगीं । विजारा शोभती दोघांलागीं । कुसुंबी पागोटीं ते प्रसंगीं । डोई बांधिली कुसरीनें ॥८६॥ हेमकटिबंध तयावरी । बाहुभूषणें उरी शिरीं । रत्नजडित कंकणें करीं । तेज अंबरीं फांकत ॥८७॥ रत्नजडित चरणीं पादुका । तयांवरी नूपुरें शोभती देखा । कटिभागीं क्षुद्रघंटिका । कांसे पीतांबर कसिलासे ॥८८॥ ललाटीं कस्तूरीचा टिळा । तयावरी अक्षता अति सोज्ज्वळा । नवरत्नजडित गळां माळा । वोप[५] गंडस्थळां फांकत ॥८९॥

शब्दार्थ - १. हवाली, २. सूक्ष्म स्वरांश, ३. रागिणींसह, ४. क्षीरसमुद्रतीरीं, ५. तेज.

श्रवणीं रत्नजडित कुंडलें सुरेख । तयावरी नागोत्तर त्याले देख । करांगुळीं मुद्रिका लखलख । तेणें दशदिशा शोभती ॥९०॥ खांदी वाहोनि रुद्रवीणा । गुरूसि करोनि प्रदक्षिणा । निघाले पहावया लीलारचना । श्रीरामाच्या यज्ञाची ॥९१॥ येवोनि श्रीरामाच्या भवनासी । सभा देखिली सहित ऋषी । पुराणिक वैदिक ज्योतिषी । नटनाटकी बैसलें ॥९२॥ बैसले पृथ्वीचे भूपाळ । बैसले पंडित शास्त्रज्ञ प्रबळ । बैसले विद्वांस ज्ञानकुशळ । आध्यात्मिक चर्चा करिताती ॥९३॥ बैसले देशींचे नागरिक जन । बैसले अग्निहोत्री ब्राह्मण । बैसले हरिदासकीर्तन । श्रीरामगुण वर्णित ॥९४॥

**रामायण गायनास प्रारंभ :** ऐसी सभा प्रसन्न वदन । करितसे संध्यातर्पण । समीप उभे भरत लक्ष्मण । शत्रुघ्न देखोन गायन मांडिलें कुमारीं ॥९५॥ सप्तस्वर मूर्च्छनायुक्त । आलाप भार्यासहित कंपित । तार[१] मंद्र[१] घोर[१] आहत[१] प्रत्याहत । हीं लक्षणें प्रसंगीं बोलिलीं ॥९६॥ ऐसें लक्षणीं युक्त रुद्रवीणा । करिती सुस्वरगायना । ध्रुवपाठाची प्रबंधरचना । सप्ततालीं गाती दोघें ॥९७॥ हा भाव कटाक्षप्रदेशीं । नृत्य करिती देखोनि श्रीरामासी । अनागत[२] भाष्य वदला ऋषी । त्या रामायणासी पैं गाती ॥९८॥ अनागत[२] भाष्य रामायण । श्रीरामाचें जन्म-कथन । आणि रावणाची उत्पत्ति निधन । जानकीवनप्रयाण गाइलें ॥९९॥ वनीं दोघे पुत्र झाले । तेंही तेथे संपूर्ण गाइलें । ऐकोनि सभालोक आनंदले । श्रीरामचरित्र ऐकतां ॥१००॥

**श्रीराम व सर्वजण त्या गायनाने प्रसन्न झाले :** श्रीरामें नित्यनेम सारून । ऋषिसभा प्रसन्नवदन । कुमारांचें ऐकोनि गायन । उल्हासे मन रामाचें ॥१॥ तंव खांदी घेवोनि ब्रह्मवीणा । नारद आला रामदर्शना । रामें देखोनि ब्रह्मनंदना[३] । पूजविधानें पूजिलें ॥२॥ आश्चर्य झालें समस्तांसी । आश्चर्य करिती महाऋषी । आश्चर्य देशिकां नगरवासियांसी । श्रीरामासी आश्चर्य ॥३॥ मधुर गायन कुमारांचें । ऐकोनि मन तोषलें श्रीरामाचें । म्हणे हे अपवयाचें । धन्य यांचे जननीजनक ॥४॥ श्रीराम म्हणे भरतासी । सुवर्ण बहुसाल द्यावें यांसी । मग भरतें तत्काळ दूतांसी । भांडारगृहासी पाठविलें ॥५॥ आणिलें बहुसाल धन । कुमारांसी जवळ पाचारून । म्हणे हें अल्प सुवर्ण । अंगीकार पूर्ण करावा ॥६॥

**सुवर्ण घेण्यास कुमारांचा नकार :** तंव ते म्हणती दोघे जण । नाहीं सुवर्णीं प्रयोजन । आम्ही वनवासी तापस पूर्ण । वनफळें भक्षून वसतसों ॥७॥ न घेऊं सुवर्ण श्रीरघुनाथा । आम्हां वनवासियां न सुवर्णकथा । धन होय हें मूळ अनर्था । त्या पंथा आम्ही न[४] वचों[४] ॥८॥ देहगेहदारासक्ती । यासीं होय पुनरावृत्ती । ऐसे अनर्थ द्रव्याप्रती । सत्य श्रीरघुपति सर्वज्ञा ॥९॥ ऐसें वैराग्ययुक्त बोलणें । कुमारांचें ऐकोनि रघुनंदनें । आनंदलीं पुरजनांचीं मनें । बाळकवचनें सुखावलीं ॥११०॥ श्रीराम म्हणे यांचें गायन । ऐकोनि सुख झालें गहन । परी हे कोणाचे कोण । समूळ कथन पुसों इच्छी ॥११॥

**कुमारांना प्रश्न :** तयांतें म्हणे श्रीरघुपती । तुम्ही कोणाचें कोठील तुमची वस्ती । काव्यकर्ता कोणें देशाप्रती । वसे तें निगुती सांगा आम्हां ॥१२॥ कुमार म्हणती अहो भूपाळा । वाल्मीक-मुनीनें हे काव्यकळा । केली कोटिशत स्वर्गमाळा । अनागत भाष्य रामायण ॥१३॥ हें केलें परोपकारार्थ । श्रवणमात्रें जग होय पुनीत । कामिकाचें पुरे आर्त[५] । श्रीरामचरित ऐकोनी ॥१४॥ ऐसें बोलोनियां बाळक । आज्ञा घेवोनि जेथें वाल्मीक । तेथें आले क्षणामाजी देख । ऋषिसंमुख उभे ठेले ॥१५॥ सांगितला सर्व वृत्तांत । वर्तला जो चरितार्थ । ते ऐकोनि ऋषि

---

शब्दार्थ – १. हे स्वरप्रकार आहेत, २. पुढील, ३. नारदाला, ४. जात नाही, ५. इच्छा.

विस्मित । उहास बहुत पैं झाला ॥११६॥ एका जनार्दना शरण । पुढें गोड निरूपण । होईल श्रीरामाचें आगमन । ऋषिदर्शन घ्यावया ॥११७॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां अश्वमेधप्रकरणं नाम पंचषष्टितमोऽध्यायः ॥६५॥ ओंव्या ॥११७॥

## अध्याय सहासष्टावा

॥ श्रीरविवंशभूषणाय नमः ॥

### लवाला पकडले

येरीकडे श्रीरामाचा वारू । निघाला भूमीवरी नव्हे स्थिरू । चालतां हेलावे सागरू । तेजें दिनकरू लोपला ॥१॥ तेजें हीन दशेचा प्रांत । वारुतेजें लखलखित । अंगभारें गजगती चालत । जेंवी आदित्य[1] पूर्वेसी ॥२॥ मागे दळभार अगणित । सांगातें वीर अपरिमित । शत्रुघ्न आणि भरत । समवेत निघाले ॥३॥ मार्गीं राखितां ठायीं ठायीं । उल्लंघिले देश नाना पाहीं । ऐसें क्रमोनि वनें घोर महीं । वाल्मीकाश्रमा वारू आला ॥४॥ तेथें झाला चमत्कार । वना गेला होता कुश कुमर । आश्रमीं लहु परम शूर । मातेजवळी खेळत असे ॥५॥

लवाने अश्वमेधाचा घोडा पकडला : तेथें जाहली नवलपरी । लहु खेळतां निघाला बाहेरी । तंव वारू आश्रमाचें परिसरीं[2] । येतां देखिला तयानें ॥६॥ घोड्याभोंवतालें पाहे । खालतें वरतें देखत आहे । हास्य करोनि म्हणे सुंदर हें । घोडें कोणाचें येथें आलें ॥७॥ शिरींची सोडिली पत्रिका । कुकुममंडित सुरेखा । वाचितां तया बाळका । अर्थ तेथींचा अवधारा ॥८॥ सूर्यवंशीं श्रीरघुनाथ । जयाचा पिता श्रीदशरथ । चवघां बंधूंसमवेत । करित राज्य अयोध्येचें ॥९॥ तयाचा हा जाणा वारू । पृथ्वीवरी सोडिला अति सुंदरू । जो असेल वीर शुरू । तयानें हा राखावा ॥१०॥ याच्या सोडवण्याकारणें । सवें असे अमित सैन्य । तें जिंतून मग श्रीरघुनंदन । तदनंतरें सोडवील ॥११॥ वाचून लहूनें पत्रिका । हांसोनियां फाडिली देखा । त्याउपरी तया बाळका । काय बुद्धी आठवली ॥१२॥ वारूचे कंठींची रत्नमाळा । घालोनियां आपुले गळां । आनंदला तये वेळा । वारु शेंडिये धरोनी ॥१३॥ गळां घालोनी अंगोस्तर[3] । अश्व कर्दळीवना[4] ने कुमर । तेथें बांधोनि सुकुमार । युद्धालागीं सिद्ध झाला ॥१४॥ तंव आले रक्षकगण । म्हणती वारु हरिला कवणें । विचारिते झाले बळवान । लहुवा पुढें देखिलें ॥१५॥ म्हणती हें दहा वर्षांचें बाळक । श्रीसीतेसारिखें रूप सुरेख । ठाणमाण अलोलिक । पाहती कौतुक तयाचें ॥१६॥

वाल्मीकींना चिंता : मुनींनीं जाणविला सीते वृत्तांत । माते तुझ्या लहूने केला अनर्थ । घोडा चोरोनि कर्दळीवनांत । ठेवोनि तेथ उभा असे ॥१७॥ तया वारूचें सोडवणे । आलें वीरांचें धांवणें । अश्व गज अगणित सैन्यें । तिहीं आश्रम वेढिला ॥१८॥ आम्हीं सांगीतलें लहूसी । अश्व सोडीं म्हणितलें त्यासी । नायके आमुचिया बोलासी । म्हणोनि तुजपासीं निरूपिलें ॥१९॥ येणें न्याय मोठा केला । वारु कैंचा येणें धरिला । आतां दळभार[5] चालिला । नेणों कैसे होईल ॥२०॥ कुश गेला वना फळांसी । आतां सीते कैसें करिसी । अवधि पुरली आमुच्या जिण्यासी । पुढें कांहीं सुचेना ॥२१॥ याचा अन्याय परम मोठा । वारु चोरोनि बांधिला खांबटा[6] । पत्रिका फाडोनि हार कंठा । आपुलिये घातला ॥२२॥ बाळबुद्धि आपण होऊन । येणें शत्रु केला श्रीरघुनंदन । आश्रमी सांडून वन । सेवूं आम्ही जानकिये ॥२३॥

शब्दार्थ - १. सूर्य, २. प्रांतामध्ये, ३. आंगवस्त्र, ४. केळींच्या वनांत, ५. सैन्यसमुदाय, ६. खांबाला.

श्रीरामचंद्राचिये कटका[1] । धरितो युद्धाचा आवांका । उभी राहोनि नावेका । आपुले नयनीं पहावें ॥२४॥ अवो सीते अवधारीं । म्हणती वारु धरिला ऋषीश्वरीं । युद्ध मांडिलें महामारी[2] । तापसां भय ओढवलें ॥२५॥ तापसांची स्त्रियाबाळें । धरोनि नेतील वो सकळें । ऐसीं गजबजलीं द्विजकुळें[3] । हडबड थोर मांडली ॥२६॥ एक म्हणती उठा पळा । भोंवतें देखती उदंड दळा । तंव पोरें करिती कोहाळा । ऋषिपत्न्या आक्रंदती ॥२७॥ एक ऐसें म्हणती ऋषी । हीं तिघें द्यावीं तयांपासीं । एक म्हणती भीड कायसी । यांची तुम्हां पडलीसे ॥२८॥

सीतेने ऋषींना अभयवचन दिले : मग म्हणे जनकदुहिता । तुम्हीं किती काय बोलता वृथा । मातें देवोनि तयांच्या हाता । आपण निसुर[4] राहिजे ॥२९॥ मज द्यावें तयांसी । आपण स्वस्थ रहावें ऋषी । आम्ही भोगूं निजकर्मासी । आनंदेंसीं रहावें तुम्हीं ॥३०॥ निवारेल तुमचें अरिष्ट। सकळां होईल सुखसंतुष्ट । विचार न दिसे दुसरा स्पष्ट । दोघां कुमरांसगट मज द्यावें ॥३१॥ ऐसी श्रीरामाची अंतुरी । पडली चिंतेचे सागरीं । रुदन करी नानापरी । तें लहूनें देखिलें ॥३२॥ मातेसि देवोनि आश्वासन । म्हणे नको करूं वो रुदन । या मशकांचा पाड कोण । दळ विभांडीन क्षणमात्रें ॥३३॥ इतुकें बोलोनि ते अवसरीं । सैनिक आले आश्रमाभीतरीं । हडबड झाली ऋषींश्वरीं । आसनें चंचळ पैं केलीं ॥३५॥ लहु म्हणे ऋषिराजा । जरी होसी श्रीगुरु माझा । तरी ऐक माझे पैजा । मी जिंकीन नरवीर ॥३५॥ मी जाणें या सैन्यातें । तुम्ही शंका न मानावी चित्तें । ऐसें बोलता वाद्यध्वनीतें । ऋषीश्वरीं आयकिलें ॥३६॥

श्रीरामांच्या सैन्याचे वर्णन : तयां वाजंत्रांची ध्वनी । दिशा दुमदुमिया तये क्षणीं । ढोल टिमक्या निशाणीं । नादें मेदिनी थरारिली ॥३७॥ एकापुढें एक वीर । सैन्य दाटलें अपार । भारापुढें चालिले भार । जैसे मेघ अंबरीं ॥३८॥ जैसे विद्युल्लतेचे थाट । अंबरीं दाटती कडकडाट । राघवसैन्य तैसें अचाट । आश्रमाभोवतें पसरलें ॥३९॥ असिवार नेणों किती । संख्या नाहीं भद्रजाती । कोट्यनुकोटी रथ घडघडती । वीर पदाती अगणित ॥४०॥ घोडियां बाणली मोहाळी[5] । कंगरटोपा[6] राघावळी[7] । आरसे बंधिले तयांतळीं । पांखरा[8] तेजाळी अनुपम्य ॥४१॥ वीरां बाणलीं कवचें पूर्ण । सम्यक संजोगूनि निशाणें । आवांका धरोनि चौदा भुवनें । पाटा वाटूनि सांडूं म्हणती ॥४२॥ ऐसी राघवसैन्यसंपत्ती । वीर भुभुःकारें गर्जती । धाकें रसातळा क्षिती । जाऊं पाहे ते समयीं ॥४३॥ दाशरथी वीर निधडे । एक निघती एकापुढें । शत्रुघ्न राखे चहूंकडे । मागें पुढें सांळाळून ॥४४॥ पराक्रमें गति गहन । सेनापति झाला शत्रुघ्न । वाल्मीक ऋषीनें देखोन । मग लहुवासि बोलाविलें ॥४५॥ आरता येईं राघवकुमरा । अरे लहुवा परम शूरा। उठावल्या महावीरा । युद्ध करीं समरांगणीं ॥४६॥ नाहींतरी वारु तयांचा । सोडून दे करीं माझी वाचा । आला लाग परवीरांचा । तो साहिला पाहिजे ॥४७॥

लवाचा निर्धार व आवेशपूर्ण उद्गार : ऐकोनि वाल्मीकाचें वचन । आवेशें बोले लहुवा जाण। म्हणे रविवंशाचा सत्य मी नंदन । तरी हें सैन्य मारीन ॥४८॥ आमुचा जन्म सूर्यवंशीं । आणि सामर्थ्य तुमच्या विद्येसी । जरी याचें भय धरीन मानसीं । तरी स्वर्गीं देव निर्भर्त्सती ॥४९॥ मी जी तुमचा सेवक । बोलतसें गोष्ट एक । अश्व सोडितां विबुधादिक । तुम्हांसि काय म्हणतील ॥५०॥ देखोनि आमचा दळभारू । भेणें ऋषीनें सोडिला वारु । ऐसी अपकीर्तीची लाज थोरू। होईल तुम्हां जी मुने ॥५१॥ पुरुषार्थे धरिला श्यामकर्ण । पूर्वीच म्यां जीवीं

शब्दार्थ - १. सैन्याशीं, २. महाभयंकर, ३. ब्राह्मणमंडळी, ४. निर्भय, ५. मोहोरकी, ६. शिरस्राण, ७. घोड्यांची कवचें, ८. झुली.

विचारून । आतां समरांगणीं मांडोनि ठाण । युद्ध करीन सत्राणें[1] ॥५२॥ ऋषि म्हणे येणें धरिला धीर । पितयासारिखा परम शूर । परी एक भय उपजे उत्तर । बाळकाप्रति बोलिला ॥५३॥ अरे लहुवा सैन्य दुर्धर । तूं तरी बाळक सुकुमार । सोडीं अश्व परता सत्वर । समरांगणीं धीर न धरवे तुज ॥५४॥ सैन्य पेटलें महामारी । तुज कोणी नाहीं साहाकारी । कुश गेला वना तो झडकरी । ये असवरीं न येचि ॥५५॥ लहु म्हणे ऋषि ताता । तुमची कृपा मज असतां । सैन्य विभांडीन पळ न भरतां । माझ्या पुरुषार्था पहावें ॥५६॥ दुजियाची जो इच्छा करी । जळो जळो तो संसारीं । तयाच्या जननीस लज्जा भारी । पूर्वजां उणे येईल ॥५७॥ धिक्‌धिक् तयाचा पुरुषार्थ । धिक्‌धिक् जिणें तयाचें व्यर्थ । धिक्‌धिक् तयाचें गोत । युद्धीं परते तो निंद्य ॥५८॥ धिग्‌धिग् तो मातेच्या कुसीं । वियोनि वंध्या म्हणती तिसी । लाज तयाचें वंशासी । ओझें पृथ्वीसी त्या नराचें ॥५९॥ तो मनुष्यरूपें केवळ श्वान । रासभाहूनि तो नर हीन । जयाचे वाटिवे भेडपण । वृथा वचन तयाचें ॥६०॥ बोलासारिखें जो न करी । पुरुषार्थ मिरवी शब्देंकरीं । तया नराचा जन्म संसारीं । पाषाणापरी जाणावा ॥६१॥ स्वयें न बोले वाढिवेसीं[2] । शत्रुनिर्दळणीं उल्हास मानसीं । आपपर नेणे रणभूमीसीं । तोचि एक पुरुषार्थी ॥६२॥ क्षात्रधर्मी निधडा पूर्ण । तृणप्राण देखे निजजीवन । रिपु निर्दळी थोर सान । न म्हणे तोचि पुरुषार्थी ॥६३॥ सर्व भूतीं दया पूर्ण । स्वकर्माविषयीं सावधान । गुरुभजनीं उदित मन । तोचि एक पुरुषार्थी ॥६४॥ जो न सांडी निजधर्मासी । स्वामिकार्जी नव्हे आळसी । मातृपितृभक्ति जयासी । तोचि एक पुरुषार्थी ॥६५॥ ऐसिया पुरुषाचें जें जिणे । तेंचि धन्य लहुवा म्हणे । म्यां जरी वारू सोडोनि देणें । लाजिरवाणें मम कुळा ॥६६॥ जे जे आले वीर उद्भट । तयांचें करीन समसकट[3] । भरतलक्ष्मणादिक योद्धे श्रेष्ठ । गळां बांधोनि आणीन ॥६७॥ ऐकोनि बाळकाच्या बोला । ऋषीश्वरा आनंद झाला । जैसा समुद्र उचंबळला । पूर्ण चंद्रासि देखोनी ॥६८॥ शिष्य देखोनि स्वरूपज्ञानी । तेणें सुखावे श्रीगुरुजननी । तैसें ऋषीश्वराचे मनीं । आनंदभरितें दाटलें ॥६९॥

**लव युद्धासाठी निघाला :** ऋषि म्हणे रावणारिसुता । विजयी होई युद्ध करितां । येरें चरणीं ठेविला माथा । मग पुढारां निघाला ॥७०॥ आधींच धरणिजेचा बाळ । चालिला जैसा पर्वत विशाळ । यावा देखोनि सैन्या पळ । राघवाचे सूटला ॥७१॥ उदय होतां तमारी । अंधकार लंघी दिशा चारी । नातरी देखोनि सर्पारी । कद्रुसुतां[4] आकांत ॥७२॥ हाक दिधली वीरें जे । तेणें नादें अंबर गर्जे । ऐकोनि सैन्यें कापिजे । दाशरथी वीर हो ॥७३॥ ऐसा सामोरा चालिला । तो शत्रुघ्नें पडखळिला[5] । म्हणे धीर धरीं लहुबाळा । रणीं उतावळा होऊ नको ॥७४॥ अरे तूं कोणाचा कोण । कोण जननी पिता कवण । वय तरी दिसतें सामान्य । पुरुषार्थ कठीण दिसताहे ॥७५॥

**लवाचे शत्रुघ्नाला परखड उत्तर :** मग म्हणे जानकीचा बाळ । सूक्ष्म कैसा वडवानळ । हनुमेनें वेढिला द्रोणाचळ । तो वानर काय म्हणावा ॥७६॥ परिसा काय पाषाणपण । खुजट म्हणों नये वामन । तारकारिपित्याचें[6] वहन । तया काय चतुष्पद म्हणावें ॥७७॥ चिंतामणीस म्हणों नये पाषाण खडा । कल्पतरूच्या वृक्ष पडिपाडा । सुधारसासी कांजी जोडा । ज्ञाते पंडित न करिती ॥७८॥ इल्वलारीसी[1] द्विज साधारण । कामधेनूस पशूसमान । सद्गुरु जो चैतन्यघन ।

शब्दार्थ - १. आवेशानें, २. शूरपणानें, ३. राखरांगोळी, ४. सर्पांना, ५. गांठिला, ६. षडाननपित्या शंकराचे.

तया मानणें मानव ऐसें ॥७९॥ हे चतुराची नव्हे युक्तीं । ज्ञाते पंडित मिथ्या मानती । मज बाळ ऐसें संग्रामाप्रती । न म्हणे सुमति वीरराजा ॥८०॥ ऐकोनि लहुवाचें वचन । संतोषला कैकेयीनंदन । म्हणे बाळकाचा अभिमान । वारू येणें एकलेनि नेला ॥८१॥ आणि सुरांसारिखी दाखवी प्रौढी । पुढील पाय मागें न पाडी । पहा हो याची धिटींव केवढी । शब्दीं अपरवडी[२] येऊं नेदी ॥८२॥ यासीं मज युद्ध करितां । लौकिकी येईल पैं लघुता । म्हणतां शत्रुघ्नें बाळकावरता । रणीं मेढा चढविला ॥८३॥ सरों न ये याच्या घायीं । आपण विंधों नये पाहीं । ययातें जिंकिलियाही । कीर्ति नाहीं पैं माझी ॥८४॥ ऐसा विचारीं पडे लवणारी । तंव बोले लहुवा अवसरी । म्हणे तूं जुंझार होसी जरी । माझा बाण सहावा ॥८५॥

शत्रुघ्न आणि लव यांचे द्वंद्वयुद्ध : धनुर्ष्यी चढविला बाण । वोडी काढोनि आकर्ण । शरीं बीजाक्षर आव्हानून । श्रीराम जयराम ऐसें ॥८६॥ ठाण मांडोनि देवढें । शत्रुघ्ना सांभाळीं आतां पुढें । बाण निघाला कडाडें । वीरां झोपडें पडियेलें ॥८॥ बाण भरतांचि गगनीं । बाणमय दश दिशा मेदिनीं । जैसा मेघ दणाणी । गडगडाट जेंवी हस्तींचा ॥८८॥ जेंवी पर्जन्याच्या धारा । तेंवी बाणीं खिळिलें अंबरा । हें देखोनि कैकेयीकुमरा । हडबड गाढी पैं झाली ॥८९॥ हा सामान्य नव्हे वीरराज । ऐसें बोलिला कैकयीआत्मज[३] । याचा गुरु निधडा सहज । जेणें ऐसी विद्या दावियली ॥९०॥ यासी प्रसन्न शस्त्रदेवता । याचा गुरु असे पुरता । म्हणोनि झाला विंधिता । शत्रुघ्न वीर ते काळीं ॥९१॥ दाशरथी वीरें सोडोनि बाण । एकें विस्तारिलें गगन । लक्षकोडी प्रसवोन । शरीं अंबर खिळियेलें ॥९२॥ एक एकातें निवारी । एक बाण पडती पृथ्वीवरी । परस्परें गगनोदरीं । उभयतां युद्धीं मिसळती ॥९३॥ मग दोघे वीर सावध । परस्परें हाणिती म्हणती शब्द । तंव शत्रुघ्नवीरें त्रिशूळी बाण भयद । लहुवावरी मोकलिले ॥९४॥ शत्रुघ्न म्हणे लहुवा वीरा । जरी तुझा गुरु असेल पुरा । तरी समरांगणीं धरिजे धीरा । माझीं शस्त्रें सांभाळीं ॥९५॥ येरु साधक वीररावो । अंगा लागूं नेदी घावो । पराक्रमी महाबाहो । रविवंशींचा लघुबाळ ॥९६॥ कैकेयीकुमरें स्मरिलें मार्तंडास्त्र[४] । कोटी प्रकटले दिनकर । लहुवा स्मरे वरुणास्त्र । अभ्र दिनकर लोपले ॥९७॥ अवघें अंतराळ व्यापिलें । कोटिसूर्य झांकोळले । शत्रुघ्न स्मरे ते वेळे । मोहनास्त्र परियेसा ॥९८॥ मोहनास्त्र येतां गगनोदरीं । ते न लगे श्रीरामपुत्रीं । रामनाम जपे बीजाक्षरीं । कवणासी उरी तेथें ॥९९॥ रामनामाचा कडकडाट । तेथें मोह ममते बारा वाट । शत्रुघ्न विचारी स्पष्ट । मोहनास्त्र वृथा गेलें ॥१००॥ हा वीर कैसेनि आतुडे । मोहनास्त्र न चले यापुढें । हा यश घेईल गाढें । ऐसें मज वाटतें ॥१॥ तंव शत्रुघ्न म्हणे भरता । मोकलीं आतां निर्वाणअस्त्रा । येरें शक्तिमंत्रें आव्हानूनि शरा । लहुवा लक्षोनि टाकिला ॥२॥ शत्रुघ्न म्हणे अगा वीरा । जरी तुझा गुरु असेल पुरा । तरी सांभाळीं माझिया शरा । धरीं धीर समरांगणीं ॥३॥ शर निघाला गर्जत गगनीं । तें लहु वीरें देखोनी । मध्येंच तोडिला टाकोनी । क्षात्रत्वेंकरून लाघवें ॥४॥ द्वादशत्रयविद्यांचे[५] साधक । परस्परें नाटोपती एकमेक । घाय हाणिती तेणें पाताळलोक । दणाणीत ते समयीं ॥५॥ मग मिसळले मल्लयुद्धीं । झोंबती हाणिती घायीं सुबुद्धीं । मारी सांपडविती उरीं खांदीं । एकमेकां लक्षोनी ॥६॥

---

शब्दार्थ - १. अगस्तीला, २. अन्याय, ३. कैकयीपुत्र शत्रुघ्न, ४. सूर्यास्त्र, ५. छत्तीस.

शत्रुघ्नाने पाठीमागून लवाला पकडले : तंव शत्रुघ्ने चमत्कार केला । मागूनि लहुवा आकळिला । सर्वेंचि रथावरी बांधिला । मग सांडिली रणभूमी ॥७॥ दोघे अयोध्ये निघाले । रथीं बाळकासि बांधिलें । मनी थोर उल्हासले । पुरुषार्थ देखोनि लहुवाचा ॥८॥ म्हणती सिंहे सिंह धरिला । शार्दूळें शार्दूळ बांधिला । पुरुषार्थियानें पुरुषार्थ केला । पुरुषार्थी जिंकिला रणमंडळीं ॥९॥ एका जनार्दना शरण । लहुवा पावला बंधन । संतोषोनि भरत शत्रुघ्न । निजनगरासि निघाले ॥११०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां लहुबंधन नाम षट्षष्टितमोऽध्यायः ॥६६॥ ओंव्या ॥११०॥

# अध्याय सदुसष्टावा

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

## भरत-शत्रुघ्न

**लहूला पकडून नेल्यामुळे जानकीचा खेद :** शत्रुघ्न घेवोनि गेला लहुया । बांधोनि जानकीच्या कनिष्ठ तनया । ऐसें ऐकोनि जनकतनया । शोकार्णवीं बुडाली ॥१॥ ऋषिकुमर सांगती सीते । लहूनें युद्ध केलें पुरुषार्थे । संतोषविलें पितृव्यातें[1] । आपुलेनि भुजबळें ॥२॥ शेवटीं बंधन पावूनी । आम्हांदेखता रथीं वाहूनी । पुत्र नेला वो सुलक्षणी । ऐकोनि विकळ सुंदरी ॥३॥ मूर्च्छा सांवरोनि ते अवसरीं । जानकी शोकातें आदरी । कपाळ पिटी निजकरीं । धावें त्रिपुरारी आकांतीं ये ॥४॥ धरणिजा म्हणे ऋषि ताता । मी काय करूं जी आतां । वेगीं सोडवा माझ्या सुता । पुत्रदानता करावी ॥५॥ माझा वनवासींचा सांगाती[2] । याचेनि होतें वनाप्रती । काय कोपला शैलजापती । आतां सांगू कवणातें ॥६॥ येरे माझ्या लहुवा बाळा । गोजिरिया रे वेल्हाळा । सुंदरा डोळसा कुशळा । परदेशींचिया सांगात्या ॥७॥ सहोदर सोडोनि आपुला । खेळावया लहु कोठें गेला । अथवा संग्राम करितां एकला । तुज वैरियें साधिलें ॥८॥ पाठीसी न देखतां सहोदर । तुज कोप आला थोर । तेणें वैरियासी मारितां मार । भागलासी पुत्रराया ॥९॥ आतां मेळवा माझें वासरूं । तयावीण न धरवे धीरू । ऐकोनि वाल्मीकासी गहिंवरू । ऋषिभार्या गजबजिल्या ॥१०॥ इतुकें बोलतां रावणारीची पत्नी । तेणें दुःखें फुटों पाहे अवनी । ऐसें ऐकोनि ऋषि मुनी । थोर दुःखा पावले ॥११॥

**मुनींचे सीतेला आश्वासन :** मुनी म्हणे रघुराज कांते । सर्वथा भय नाहीं त्यातें । कुश येवोनि त्या सैन्यातें । जिंकोनि बंधु सोडवील ॥१२॥ पितृव्यातें बांधोन । तुझे लहुकुश येतील जाण । आणि समस्त रायां गळबंधन । करितील जाण पुत्र तुझे ॥१३॥ पूर्वी मी वदलों भविष्य । मानीं माझ्या शब्दाचा विश्वास । हे निधडे जाण पुरुष । बाळक यातें म्हणों नये ॥१४॥ सत्य जाण दूषणारिप्रिये[3] । सूर्यवंशींचे निधडे वीर हे । यांचिये पुरुषार्थाची उपमा नये । आणिकासी देतां हो ॥१५॥

**कुशाचे आगमन व त्याची प्रतिज्ञा :** इतुकें बोलतां वाल्मीकि । तंव कुश आला आश्रमाचे तटाकीं । त्यातें देखोनियां जानकी । दुर्घट दुःख सांगत ॥१६॥ अरे कुशा लहुवातें । बांधोनि नेले शत्रुघ्नभरतें । रथीं वाहोनियां अयोध्यापथें । गमन केलें दोघीं जणीं ॥१७॥ कुशा आतां काय करूं । कोण सोडवील माझें वासरूं । केव्हा देखेन निज कुमरू । रणरंगधीर संग्रामीचा

---

शब्दार्थ - १. चुलत्याला, २. सोबती, ३. हे रमाकांते (सीते)

॥१८॥ ऐकोनि लहुवाचे हरण । तेव्हांच माझा त्यासवें प्राण । गेला कुशा सत्य जाण । नाहीं अनमान येविषयीं ॥१९॥ करुणा ऐकोनि मातेची । कुशें गुढी उभविली प्रतापाची । म्हणे माते चिंता लहुवाची । तुजकारणें पैं नलगे ॥२०॥ पाताळा नेला असेल बाळू । तरी सोडवीन शेषाची मर्दोनि टाळू । नाहीं तरी हा अवघा भूगोळू । पालथा करीन जननिये ॥२१॥ शोषीन अब्धीचें[1] पाणी । आकाश पाडीन खोंचोनी । नातरी प्रळयकाळींचा वन्हीं[2] । शीतळ करीन क्षणार्धे ॥२२॥ मेरु उपडीन भुजबळें । शोधीन सप्त द्वीप कुळाचळें । घरथांडोळी घेवोनि पाताळें । नागकुळें मारीन ॥२३॥ वैकुंठ कैलास सत्यलोक । भूमंडळ शोधीन सम्यक[3] । दिक्पालादि स्वर्ग लोक । दमीन त्रैलोक्य निमेषार्धें॥२४॥ घेवोनि येईन तुझा कुमरू । तरीच मी सूर्यवंशींचा वीरू । सत्य असेल श्रीगुरू । माझिया मस्तकावरी ॥२५॥ तेथें कायसें रावणारीचें सैन्य । एके बाण सर्व खिळीन । जीत बांधोनि भरतशत्रुघ्न । सहलक्ष्मण हनुमंतेसीं ॥२६॥ म्हणोनि वंदिले मातेचे चरण । श्रीगुरूसी करोनि साष्टांग नमन । मग प्रदक्षिणा दोघां करून । आज्ञा मातेसी पुसतसे ॥२७॥ जनकजा म्हणे कुशासी । जीवें न मारावें रामसैन्याचे वीरांसी । धरून आणावें थोरथोरांसी । वारुवापासीं बांधावें ॥२८॥

मातेला वंदन करून कुश युद्धार्थ निघाला : आशीर्वाद घेवोनि निघाला । सिंहनादें गर्जिन्नला । बाण धनुर्ष्यी चढविला । अंगीं बाणला पुरुषार्थ ॥२९॥ चालतां पुढारां पाउलें । शीघ्र रणभूमीसी गांठिलें । तंव एके रथीं बंधूसी देखिलें । भरत शत्रुघ्नेंसीं ॥३०॥ तेचि रथीं लहु वीर । कुशास देखोनि आनंद थोर । म्हणे सोंडवूं आला दादोजी सत्वर । हर्ष न माये पृथ्वीवरी ॥३१॥ कुशें लहुवा बंधनेंसीं । देखियेला पितृव्याचे रथासीं । क्रोधें भडका उठला मानसीं । सृष्टि निर्दळीन म्हणे आतांचि ॥३२॥ क्रोध कुशाचा देखोन । भेणें कांपे त्रिनयन । भयभीत श्रीजनार्दन । ब्रह्मादि देवगणां चळकांप ॥३३॥ कीं गजावरी केसरी । कीं तमावरी जैसा तमारी । कीं स्तंभीं प्रकटे हरिण्यकश्यापारी । तयेपरी कुश शोभे ॥३४॥ कीं आकाशसुत[4] मेघपटळा । कीं दितिसुतावरी मेघ[5] सांवळा[5] । कीं कद्रुसुतावरी प्रताप आगळा[6] । मिरवी जैसा विनताबाळ[7]॥३५॥ कीं प्रळयकाळीं दक्षजामात[8] । सृष्टीचा संहार करीत । तैसा शक्रजितारि-अग्रजाचा सुत । वेगवंत रणमंडळीं ॥३६॥ हातीं घेवोनि धनुष्यबाण । जैसा चाले पंचानन । हृदयीं श्रीगुरु स्मरोन । मग शत्रुघ्न पाचारिला ॥३७॥

शत्रुघ्नाला आव्हान : अरे कैकयीच्या लघु बाळा । प्रताप दावोनि आगळा । संतोषविलें अग्रजा आणि दळा । आतां मजसीं कुशळ युद्ध करीं ॥३८॥ बांधोनि माझा सहोदर । तुज झाला जैतबडिवार । तुमचा पूर्वापर विचार । तुम्हीं नाहीं आयकिला ॥३९॥ श्रीरामाकारणें झालेति योगी। श्रीरामालागीं झालेति वीतरागी । आतां आलेती युद्धालागीं । हें अपूर्व वाटतें ॥४०॥ तुम्हीं करावें अनुष्ठान । तुम्हीं करावें तप:साधन । आतां धरोनि आंगवण । युद्ध दारुण करूं आलेती ॥४१॥ श्रीरामाकारणें सोडूनि राज्यभोग । तुम्हीं नंदिग्रामीं साधिला योग । मस्तकीं जटा धरोनि ऋषिमार्ग । आश्रयोनि होतेती ॥४२॥ आतां संग्रामाच्या चाडा युद्ध करूं आलेति पुढां । श्रीरामकटकीं दुकाळ गाढा । महावीरांचा पडिला हो ॥४३॥ कोणी न दिसे वीर झुंझार । तुम्ही नावानिगे परम शूर । म्हणोनि धाडी श्रीरामचंद्र । युद्धाकारणे

शब्दार्थ -१. समुद्राचें, २. अग्नी, ३. पूर्णपणे, ४. वायू, ५. श्रीकृष्ण, ६. मोठा, ७. गरुड, ८. शंकर.

तुम्हांतें ॥४४॥ जानकीचा ज्येष्ठ कुमर । शत्रुघ्नासी होवोनि समोर । काय बोलतसे उत्तर । सावधान अवधारा ॥४५॥ उणें आलें तुझिया नामासीं । तुवां संग्राम केला कोणासीं । आतां साहें माझ्या बाणासी । म्हणोनि शरासी सोडिलें ॥४६॥

**लवकुशांनीं भरत-शत्रुघ्नांना पकडून नेले :** नारायणास्त्र जानकीकुमरें । बीजाक्षरें जपोनि सोडिलें त्वरें । सर्व सैन्यीं नारायण अवतरे । दशदिशां भरे चतुर्भुज ॥४७॥ नारायण धरित्रीं पाताळीं । नारायण आकाशीं अंतराळीं । नारायण नभोमंडळीं । कुळाचळीं नारायण ॥४८॥ सैन्य अवघें नारायणें । व्यापिलें देखोनि शत्रुघ्नें । गजबजोनियां मनें । संग्राम करूं विसरला ॥४९॥ जैसा एकादा प्राणी । स्वप्नीं तस्कर देखे नयनीं । जागृत जंव होय उठोनी । तंव घरभरी तस्कर देखिजे ॥५०॥ तैसें झालें शत्रुघ्ना । नारायणरूप देखोनि मना । विस्मयो झाला अंतःकरणा । संग्राम करूं विसरला ॥५१॥ सवेंचि कुशें परम सत्वर । बाणीं विंधोनि पाडिला कैकसीकुमर । चरणीं धरोनि बांधिला वीर । रथातळीं उतरविला ॥५२॥ रथ मोडिला चपेटघातें । लहुवा सोडोनि घेतला तेथें । सवेंचि पाचारिलें भरतातें । तुम्हीं यावें संग्रामा ॥५३॥ कुश म्हणे भरतातें । तुम्हीं पादुका पूजाव्या घरातें । अथवा परभारें नंदीग्रामातें । अनुष्ठानालागीं जावें ॥५४॥ वचन ऐकोनि भरतें तेच क्षणीं । क्रोधें प्रज्वळिला जैसा वन्ही[१] । म्हणे बाळका समरांगणीं । माझा शर साहें रे ॥५५॥ तूं तरी बाळकाकार । माथेचा वाळला नाहीं जार । आतां साहें माझा शर । नाहीं तरी ऋषीस शरण जावें ॥५६॥ मग टाकिला काळदंड । एकचि बाण परी झाले उदंड । रावणारिकुमर साधक वितंड । वरच्यावरी तोडिले ॥५७॥ लहुवाअग्रजें वीरें कुशें । घातले शरांचे फांसे । रामानुज कासाविसें । संग्राम करूं विसरला ॥५८॥ भरत भुलला रणीं । मागेपुढें पाठीराखा न दिसे कोणी । तंव अवचितें कुशें बांधोनी । रथातळीं पाडिला ॥५९॥ दोघे बांधोनियां रणीं । परतला निजाश्रमालागोनी । भरत शत्रुघ्न एकत्र दोन्ही । ऐसे आणिले ऋषिआश्रमा ॥६०॥ बांधोनि खरदूषणारीचे[३] अनुज । मातेची सत्य करोनि पैज । दोघे संतोषें रामात्मज[४] । आश्रमा उजू पैं आले ॥६१॥ सवें दोघे भरत शत्रुघ्न । एके रथीं बांधिले जाण । सीतेनें दुरोन देखोन । ऋषीप्रति बोलली ॥६२॥ धरणिजा म्हणे अहो ऋषी । दोघे नाणावे माझ्या दृष्टीसीं । मज देखोनि लाजें प्राणांसी । त्याग करितील निश्चयें ॥६३॥ मग ऋषीनें शिष्यां खुणविले । कर्दळीवनासी पाठविले । जेथें असे अश्व बांधले । तेथें दोघे राखावे ॥६४॥ जानकीकुमर विजयी रणीं । दोघे आले गुरुदर्शनीं । साष्टांगें नमस्कारूनि मुनी । मग मातेसी वंदिलें ॥६५॥ मातेनें करोनि निंबलोण । धन धान्य ओंवाळून । दोघां हृदयीं आलिंगून । समाधान पावली ॥६६॥ पुढील कथा अति रसाळ । श्रवण करितां मुखा येतसे लाळ । मनाची जिव्हा करी तळमळ । युद्ध तुंबळ करूं इच्छी ॥६७॥ पुढें पित्यापुत्रां होईल रण । असंभाव्य अति दारुण । तेथे श्रोते हो व्हावें सावधान । रामायण अति गोड ॥६८॥ वाल्मीकाचीं वाग्रत्नें । तीं प्राप्त केलीं जनार्दनें । एका जनार्दनाचें तान्हें । संतांचें पोसणें म्हणोनी ॥६९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां भरतशत्रुघ्नबंधनं नाम सप्तषष्टितमोऽध्यायः ॥६७॥ ओंव्या ॥६९॥

---

शब्दार्थ – १. अग्नी, २. भरत, ३. श्रीरामाचे, ४. रामपुत्र.

# अध्याय अडुसष्टावा

॥ श्रीरघुपतये नमः ॥

## लक्ष्मण-हनुमंताला पकडून नेले

उरलेल्या सैन्याने रामांना वृत्तांत सांगितला : गतप्रसंगीं अनुसंधान । ऐसें असे निरूपण । भरत शत्रुघ्नासी बांधोन । कुशें जाण युद्ध केलें ॥१॥ उरल्या सैन्या करोनि मार । विजयी दोघे राजकुमर । भरतशत्रुघ्न बांधोनि वीर । अश्वापासीं राखिलें ॥२॥ येरीकडे रणीं पडिले । ते सावध होवोनि बैसले । मागें पुढें पाहात ठेले । तंव कोणी नाहीं युद्ध करित ॥३॥ ऐसें देखोनि घायाळ वीरीं । कण्हत कुंथत साकेतपुरीं[1] । प्रवेशतां मार्गीं एके पुरीं । करिती गजरीं महाशब्द ॥४॥ एकांचें फुटलें शिर । एकांचे उखळले[2] कर । एक सर्वांगें जर्जर । एक अशुद्धें डवरिले ॥५॥ एक रडत पडत । एक कटिभंगें येती लोळत । एकांची लोंबतीं[3] अंतें । घायीं शस्त्र अडकले ॥६॥ एकांचें धांकें फुटलें पोट । एकांचा घरघरा वाजे कंठ । एकांचे कान नाक सपाट । एक चटपटें दुःख करिती ॥७॥ एक हृदयीं भेदले । एकांचे कंठ भंगले । एक भयें वोसणलें[4] । म्हणती मारूं नको कुशा वीरा ॥८॥ ऐसियापरी घायाळ वीरीं । प्रवेशिजे ती अयोध्यापुरी । तंव भद्रासनीं दूषणारी[5] । तयासमोर पै आले ॥९॥ सिंहासनीं जनक जामात । बैसला जैसा काय अब्धिसुत[6]। सभोंवतें तारागणें तैसे प्रधान समस्त । अनुज[7] सौमित्र बैसला ॥१०॥ राजवर्ग सभानायक । भोवतीं राजे मांडलिक । वसिष्ठविश्वामित्रादि ऋषी सम्यक । सेना सैनिक शोभत ॥११॥ तंव घायाळ पुढें देखिलें । तयांसि लक्ष्मणें पुसों आदरिलें । कोण कोठें युद्धें झालें । कोणें गांजिलें तुम्हांसी ॥१२॥ तंव घायाळ म्हणती शुक्रारिअरी । दोघे कुमर वनांतरीं । द्वादशवर्षांचिये वीरीं । सेना सैनिक मारिले ॥१३॥ तिहीं दोघीं पराक्रम । करोनि साधिला संग्राम । तयांमधील कनिष्ठ परम । तेणें युद्ध पूर्वी केलें ॥१४॥ शत्रुघ्नें तयासि जिंतिलें । धरोनि रथीं बांधिलें । तयाचें सोडवणे ज्येष्ठें पुत्र केलें । तें राजेंद्रा अभिनव ॥१५॥ वाल्मीकाचिया आश्रमीं । दोघे कुमर पराक्रमी । गौर श्याम एका सादृश्य श्रीरामीं । जानकीसारिखा एक असे ॥१६॥ दोघे दोघांसारिखे । करीं शर आणि चाप काखे । धनुर्विद्येंचें अति नेटके । युद्ध न ठाके तयांसीं ॥१७॥ एकें तुमचा वारू धरिला । सैन्यें शत्रुघ्नेंसीं झगटला । पराक्रम थोर केला । तो धरोनि आणिला भरतानुजें ॥१८॥ तयाचे सोडवण्याकारणें । ज्येष्ठा झालें युद्धा येणें । युद्धीं वीरां केलें ठेंगणें । आकाश बाणीं व्यापिलें ॥१९॥ तेणें घालोनि मोहनास्त्र । धरोनि नेले दोघे राजकुमर । आम्हां वाटतें ते वीर । अयोध्येचें राज्य घेतील ॥२०॥ भरत शत्रुघ्न पाडाऊ[8] झाले । दोघे रथासीं बांधिले । आम्हांसी मारोनि निघाले । वाल्मीकाच्या आश्रमा ॥२१॥ करोनियां श्रीरामस्मरण । तेणें आमुचें वांचले प्राण । सांगतां लज्जा दारुण । वाटतसे हो राजेंद्रा ॥२२॥ सैनिकांचें ऐकोनि वचन । हांसोनि बोले रघुनंदन । आश्चर्य करी ऊर्मिलारमण । म्हणती नवल वर्तलें ॥२३॥ विनोदें बोले रघुनंदन । ते धाकुटें वय सामान्य । तिहीं कैसें मारिलें सैन्य । मुख्य नायक धरिले कैसे ॥२४॥ तंव श्रीगुरु म्हणे रावणारी । युद्धीं सामान्य न म्हणावे अरी । त्यांचा पुरुषार्थ नृपकेसरी । आम्हां विदित पैं आहे ॥२५॥ कोणी एका क्षत्रियाचे कुमर । विद्या

शब्दार्थ -१. अयोध्यानगरी, २. ढिले झालें, ३. आंतडीं, ४. बडबडले, ५. रामचंद्र, ६. चंद्र, ७. कनिष्ठ बंधू, ८. पराजित.

शिकवी वाल्मीक ऋषीश्वर । ते महा बळियाढे वीर । अपूर्व कांही न मानावें ॥२६॥ यावरी बोले ऊर्मिलारमण । मज आज्ञा दीजे कृपा करून । जीत दोघे आणीन धरून । निजबंधु सोडवून श्रीरामा ॥२७॥

त्या कुमारांना पकडून आणण्याचा विडा उचलून लक्ष्मण युद्धाला निघाला : श्रीरामें पैजेचा देवोनि विडा । मग तो लक्ष्मण धनुर्वाडा । निजपुरुषार्थाचा पवाडा । अग्रजासमोर बोलतसे ॥२८॥ दोघे बंधु सोडवीन । ते दोघे बंधु जीत धरीन । तरीच तुमचा सेवक जाण । विजयी होईन तिंहीं लोकीं ॥२९॥ म्हणे रथ पालाणा रे पालाणा । सन्नद्ध करा चतुरंग सेना । घाव घातला निशाणां । केली गर्जना महावीरीं ॥३०॥ वीर चढले अश्वांवरी । एक बैसले रथावरी । एक आरूढले कुंजरी । एक पायीं निघाले ॥३१॥ सवें जुत्पती निघाले । नळ नीळ जाबवंत पातले । गंधमादन अंगद आले । वायुसुत येता झाला ॥३२॥ संवत्सरलक्ष[1] नृपवर । पुराणसंख्यापद्म[2] वानर। सप्त दशकांवरी दोन कोटि वीर । गोळांगूळें चालली ॥३३॥ साकेतपुराबाहेरी । निघाले आपुलाले भारीं । पल्लव छत्रें शृंगारीं । मयूरपत्रें झळकती ॥३४॥ रामानुज वीररावो । रिपुदळणीं महाबाहो । फुटों पाहे ब्रह्मकटाहो । सेना अगणित चालली ॥३५॥ लागली वाजंत्रांची एक घाई । कांनीं पडलें नायकवें कांहीं । मुक्तामाळा वारुवां पाहीं । टके पताका नीळवर्ण ॥३६॥ निशाणावरी श्रीरामनाम । ढाला पताका नामांकित परम । देखतां रिपूचा पराक्रम । ठेंगणा होय संग्रामीं ॥३७॥

लक्ष्मणसैन्याला अपशकुन, त्यामुळे साशंक : ऐसे मार्गी चालले । तंव अपशकुन झाले । कागपक्षी डावेच गले । आपुलिये भारेंसीं ॥३८॥ सवेंचि पुढें निर्नासिक[3] । केस सुटले उघडा मस्तक । समोर द्विज आला एक । तेणे वीर थरारिले ॥३९॥ म्हणती झाला अपशकुन । मागें फिरतां हांसती जन । पुढें होतां जीवदान । न उरती निश्चयेसीं ॥४०॥ एक म्हणती सरा मागें । एक म्हणती रहा उगे । धैर्य धरोनि लक्ष्मण वेगें । पुढें सेना चालविली ॥४१॥ ऐसे चालिले महावीर । मनीं धाक परम थोर । म्हणती काय करील श्रीशंकर । तें न चुके कल्पांतीं ॥४२॥ ऐसें न मानितां चालिले । ऋषिआश्रमासि पातले । भार रचोनि राहिले । म्हणती कुमर पैं दोघे ॥४३॥ उभयतां वीरांच्या युद्धाकारणें । स्वर्गी देवां उत्साह मनें । पहावया दाटलीं विमानें । विबुध[4] वरोनि पाहती ॥४४॥ नारद खांदीं घेवोनि वीणा । पाहूं आला युद्धरचना । उल्हासें करतसे गर्जना । श्रीराम नारायण म्हणोनी ॥४५॥ हांसे नाचे नारद । पाहोनि सूर्यवंशींच्या वीरांचे युद्ध । शेंडी तडतडी राम गोविंद । मुखें नाम उच्चारी ॥४६॥

लवकुशांचे सीतेला अभयवचन : येरीकडे लहु कुश वीरें । सेना देखिली उल्हासें थोरें । म्हणती कृपा केली शाङ्‌र्गधरें[5] । मातेसि आज्ञा पुसताती ॥४७॥ कर जोडोनि दोघे वीर । उभे राहिले जानकीसमोर । म्हणती माते आज्ञा सत्वर । अनुग्रह करोनि पैं द्यावी ॥४८॥ जनकजा पाहे दुरोन । तंव देखे सुमित्रानंदन । म्हणे आलें रावणारिसैन्य । आतां काय करूं माये ॥४९॥ जानकी म्हणे आज दिवसवरी । पडलें दुःखाच्या सागरीं । दोघीं बाळकें वनींचीं सोयरीं । यांसि संकट मांडलें ॥५०॥ आतां काय करावें । किंवा धरणीमध्ये जावें । किंवा कुमर पळवावे । आणखिया वनांतरा ॥५१॥ तंव कुमर म्हणती अवो माये । चिंता करूं नको जननीये । सेना अवघी मारीन पाहें । सैनिक राजे जीत धरीन ॥५२॥ रणीं नाचवीन रणधेंडा । ओंवाळणी वीरांच्या मुंडा । तृप्त करोनि चामुंडा । रुधिरें सडा घालीन ॥५३॥

शब्दार्थ – १. साठ लक्ष, २. अठरा पद्म, ३. नकटा देव, ४. श्रीहरीने.

तृप्त करोनि भूतगण । मारीन राघवाचें सैन्य । तीच तुझे कुशींचा जाण । तरीच शिष्य वाल्मीकाचा ॥५४॥ त्रिसत्य सत्य मम भाषण । हा माझा गुरूसीं अभिमान । हें मन पूर्वजां निजभूषण। नाहीं तरी पाषाण जन्मलों दोघे ॥५५॥ ऐसें ऐकोनि पुत्राचें वचन । जानकीचें निवालें मन । हर्षे दिधलें चुंबन । धन धान्य ओंवाळोनि सांडी ॥५६॥ दशरथस्नुषा बोले वचन । अवघे आणावे धरून । कोणाचा न घ्यावा जीव प्राण । बंधन करून राखावे ॥५७॥

मातेला वंदन, लवाकडून अंगदास बंधन : करोनि मातेसि नमन । दोघीं केल्या प्रदक्षिण । नमस्कारोनि गुरुचरण । धनुष्यबाण घेतले ॥५८॥ दोघे जैसे दोनी पर्वत । चालिले पुढें सैन्य लक्षित । माथा तुकावोनि[१] धनुर्ष्यी सीत[२] । चढविते झाले ते समयीं ॥५९॥ ऐसे चालिले रणमेदिनीं । पुढें अंगद देखिला नयनीं । तया कुशें हाटकोनि । युद्धालागीं पाचारिलें ॥६०॥ अरे मर्कटसुता महावीरा । धावूं नको सैरावैरा । राघवारीचे मंडपाचे बारा । खांब आणिले तैसे नव्हे ॥६१॥ लहुवा राहें साहें म्हणत । तंव अंगदें टाकिला पर्वत । येरु शरधारें तोडित । मग म्हणत तारातनयातें[३] ॥६२॥ तें येथें न चले आम्हांसीं । आतां साहें माझ्या बाणासी । म्हणोनि विंधिलें अंगदासी । रणीं मूर्च्छेसीं पाडिला ॥६३॥ मग सावध करोनि वालिसुत । लहुवा तयासि बांधित । जेथें होते शत्रुघ्न भरत । तेथें नेवोनि घातला ॥६४॥ अंगदा ऐसी दशा देखोन । मग बोलिला भास्करनंदन[४] । यासीं युद्ध करितां दारुण । अनर्थ दिसे वानर हो ॥६५॥ इहीं वालिसुत नेला धरोन । आमुचा झाला मुळींच अपमान । आतां काय काज वांचोन । स्वर्गी देव हांसती ॥६६॥ म्हणोनि कपिपति चालिला । म्हणे राहें साहें बाळा । तुझे माथेचा जार नाहीं वाळला । काय युद्ध करसील ॥६७॥ सुग्रीव म्हणे तुमची जननी । विसंबली कैसी तुम्हांलागूनी । तुम्ही मातेचे लाडके दोनी । कैसे युद्धा आलेति ॥६८॥

कुशाकडून सुग्रीवाची अवहेलना व अस्त्रप्रहाराने रामसैन्याची दाणादाण : ऐकोनि कुशा आलें हांसें । म्हणे तूं पालेखाइरें पिसें । उडावें वृक्षावरी जैसें तैसें । फळें खावयालागूनी ॥६९॥ न तुम्हांसी संग्रामा करूं काय । म्हणती वानर मारिलें पाहें । तेणें माझी कीर्ती न होय । न वाखाणिजे वीरमुखीं ॥७०॥ ऐसें बोलोनि कुशें जाण । पुन्हां बोलता झाला वचन । म्हणे तूं नपुंसक दारुण । श्रीरामा शरण गेलासी ॥७१॥ ज्येष्ठ बंधूनें हरिली कांता । तियेचे दुःखें वनी वसतां । भाग्यें भेटलासि रघुनाथा । दोघे सारिखे मिळालेति ॥७२॥ कपटें करोनि वालिवध । तुजही दिधलें राज्यपद । तो तूं करूं आलासि युद्ध । हें मज अपूर्व वाटतसे ॥७३॥ आतां करी मजसीं रण । म्हणोनि कुशें श्रीगुरू स्मरोन । सीतीं बाण चढवोन । बीजाक्षरें जपता झाला ॥७४॥ जपोनियां बीजाक्षर । शक्ति टाकिली महाघोर । तेणें कडकडाटें अंबर । पडों पाहे अवनीवरी ॥७५॥ महा धुंधाट सुटला । वानरां प्रळय आरंभिला । म्हणती रघुनाथ कोपला । संहार झाला सकळांचा ॥७६॥ शर लागती झणाझणां । कपि सोडूं पाहती प्राणां । म्हणती रक्षीं रक्षीं सुमित्रानंदना । म्हणोनि पाठीं रीघती ॥७७॥ नभीं भोंवतीं पिसारे । आवर्तीं[५] पडलीं वनचरें । निघती आर्ते[६] तयाचे भारें । हाहाकार प्रवर्तला ॥७८॥ सुधापानीं[७] भयातुर गगनीं । विमानें पडती खचोनी । देव पळाले तेथूनी । बाण लागती म्हणोनियां ॥७९॥ एक शाखामृग[८] म्हणती । कोपिन्नला श्रीरघुपती । सादृश्य पुढां देखती । जाणों दुसरा

---

शब्दार्थ - १. हालवून, २. धनुष्यदोरी, ३. अंगदाला, ४. सुग्रीव, ६. संकटात, ६. आंतडीं, ७. देव, ८. वानर.

श्रीराम ॥८०॥ एक श्याम राजीवलोचन । दुसरा शोभे गौरवर्ण । म्हणती हाचि रघुनंदन । तटस्थ होवोनि पडियेले ॥८१॥ पडिले अष्टादृश जुत्पती । मूर्च्छित पडिले नाहीं शक्ती । मग लहुवें बांधिलें निगुतीं । तयांची नामें अवधारा ॥८२॥ नळ नीळ जांबवंत । सुग्रीव सुषेण दधिमुख वीर्यवंत । द्विविद कुमुद तारासुत । गंधमादन दहावा ॥८३॥ तार तरश हेमकूट । पनस केसरी सुभट । गज गवाक्ष गवय धीट । अठरा जुत्पती ऐसे हे ॥८४॥ जेथें होते रामानुज । तेथें नेला कपिसमाज । बांधोनि पुन्हां वीरराज । सावध असे रणभूमीं ॥८५॥

लक्ष्मण सचिंत : येरीकडे शक्रारिहंता । म्हणे काय करावें वायुसुता । अपकीर्ति बैसली माथां । उपाय पुढां न दिसेचि ॥८६॥ आमचे महाकपि वीर । संग्रामीं जिहीं जिंकिले निशाचर । तयांतें बांधोनि हे कुमर । नेती द्वादश वर्षांचें बलाढ्य ॥८७॥ काय हे स्रष्ट्यानें रचिले । किंवा अवनीपासाव झाले । कीं अकरा रुद्र एकवटले । द्वैतरूप धरोनी ॥८८॥ किंवा दोन रूपें हे कळिकाळ । किंवा दोघे हे कुळाचळ । कीं दोघेही श्रीराम प्रबळ । गर्वहरणार्थ निर्मिले ॥८९॥ कीं ग्रहांत केतु राहो । किंवा विष्णु महादेवो । किंवा शशिसूर्य पहा हो । रिपुरूप अवतरले ॥९०॥ किंवा रावणारीच्या हत्या । एकीभूत होवोनि समस्ता । द्वैतरूपें अंजनीसुता । आम्हांवरी चालिल्या ॥९१॥ कीं जानकीहृदयींचा कोपाग्नी । प्रकटला धरोनि रूपें दोनी । पुढारला शोषावयालागूनी । तैसे दोघे दिसताती ॥९२॥ किंवा अवनिजा म्यां सांडिली वनीं । ते होती गा तैं मासत्रयगुर्विणी[1] । तिचे हे आत्मज[2] दोनी । असित[3] गौर दिसती ॥९३॥ लहु रावणारीसारिखा । कुशा धरणिजे सादृश्य देखा । हनुमंता तुज असे ठाउका । हा वृत्तांत गुप्त करीं ॥९४॥ जरी हे धाकुटे म्हणावे कुमर । तरी शक्ति सुरेशाहूनि थोर । धरोनि आमुचें वीरें वीर । लाज थोर लाविली इहीं ॥९५॥ पुढे काय युद्ध करावें । युद्ध करितां घेतील जीवें । फिरोनि जातां हांसिजेल राघवें । नपुंसक म्हणोनी ॥९६॥ इतुकें ऐकोनि वायुसुत । सौमित्राप्रति झाला बोलत । जैसा श्रीराम तैसे तुम्ही आम्हां येथ । माझा पुरुषार्थ पहावा ॥९७॥

मारुतीची वल्गना. कुशाकडून पराभव : रुद्रावेशें रुद्र जाणा । पुच्छ वाहोनियां गगना । आरक्त करोनियां नयना । केली गर्जना विटंक[4] ॥९८॥ हनुमान म्हणे अरे वीरा । मागें सरूं नको धरीं धीरा । तुज म्हणों ती एकसरा । सावध पैं व्हावें ॥९९॥ कुश बोले ते समयीं । अरे मर्कटा मुख आपुलें दर्पणीं पाहीं । काळें झालें ये समयीं । काय दाविसी पामरा ॥१००॥ लंका जाळिली तये वेळें । मुख तुझें झालें काळें । सिंतरोनि[5] राक्षसें निर्बळें । रणरंगी मारिलीं ॥१॥ कुश म्हणे अंजनीसुता । ऐक तुझ्या स्वामीची कथा । जेणें घरचीं दवडिलीं कांता । तयाची कथा कायसी ॥२॥ नांदती स्त्री दवडिली । तयाची वीरश्री काय चांगली । आतां तुम्हां भुली पडली । युद्ध करूं आलेती ॥३॥ ऐसें वर्तलें तुमचे घरीं । ज्याची शक्ति झाली रानभरी । तो पुरुष यशवंत या संसारीं । कोणे समयीं होईल ॥४॥ उणें स्वामीचें ऐकोन । खवळला अंजनीनंदन । जया शैलावरी बहु वन । घेवोनि गगनीं उडाला ॥५॥ सर्वेचि आणिक पर्वत चारी । घेता झाला अशोकवनारी । एक उरीं एक शिरीं । कीं दोनी दो कांखे ॥६॥ पंच पर्वतेसीं वायुसुत । येतां जयाचा पिता रघुनाथ । मग तेणें वीरें वज्रास्त्र । जपोनि गुणीं लाविलें ॥७॥ पुरती कानाडी[6] ओढून । अभिमंत्रोनि सोडिला बाण । वरिचेवरी शैलखंडण । हृदयीं

---

शब्दार्थ - १. तीन महिन्यांची गरोदर, २. मुलगे, ३. शुभ्र, ४. मोठी, ५. ठकवून, ६. धनुष्याची दोरी.

बाण भेदला ॥८॥ पंचकद्वय अयुतें दुरी । हनुमान पिटिला ते अवसरीं । सप्तसमुद्रांच्या पारीं । अवनीवरी आफळला[1] ॥९॥ देहाची वळली मुरकुंडी । मान झालीसे वांकडी । अशुद्ध[2] वाहों सरलें तोंडीं । गतप्राण ऐसें झालें ॥११०॥ मग सावध होवोनि हनुमंत । तटस्थ राहिला निवांत । तंव वायु आलासे धांवत । बुझावीत निजपुत्रा ॥११॥

**वायूकडून मारुतीला कुमारांची माहिती :** वायु म्हणे गा हनुमंता । तूं नेणसी त्याच्या वृत्तांता । ते राघवाचे पुत्र तत्वतां । पितयासारिखे पुरुषार्थी ॥१२॥ लहु कुश दोघे कुमर । बळाचे दोघे गिरिवर । तयांत कनिष्ठे हे थोर । युद्धीं प्रौढी दाखविली ॥१३॥ हें वचन प्रकट न करावें । हृदयीं गुप्त असों द्यावें । पुढील कर्तव्य लक्षावें । वेगीं जावें रामकार्या ॥१४॥ ऐकोनि पित्याचें वचन । हनुमान खालती घाली मान । हृदयीं स्मरे श्रीरामचरण । माझें स्मरण असो द्यावें ॥१५॥ ऐसा तो श्रीहनुमंत । हृदसीं स्मरोनि श्रीरघुनाथ । हळु हळु निजकटकांत[3] । येता झाला लाजेनें ॥१६॥ वज्रदेही बळियाढा । एवढे भोगिलें दुर्वाडा । तेथें कायसें इतरांच्या पाडा । वानरां मूढां कोण पुसे ॥१७॥ ऐसियापरी श्रीराम स्मरण । देखे हनुमान आपुलें सैन्य । लाजा प्राण जाय तंव लक्ष्मणें । दुरोनि येतां देखिला ॥१८॥

**लक्ष्मणाचा आवेश व कुशाकडून त्याचा उपहास :** सौमित्र म्हणे गा कपिवीरा । थोर कष्टलासी परम शूरा । आतां स्थिर राहें मी या कुमरां । सीक[4] लावीन रणमारें ॥१९॥ मग चालिला रामानुज । जयाचा रथ दिव्य तेजःपुंज । वारुवा सांट[5] देवोनि वोज । निजभारेंसीं लोटला ॥१२०॥ धनुर्ष्यी चढवोनियां गुण । बोलता झाला लक्ष्मण । अरे वीर हो श्रीरामा शरण । येतां प्राण राखीन तुमचें ॥२१॥ ऐसें न माने तुमच्या चित्ता । तरी प्राण घेईन आतां । पळूं नका धीर धरा पुरता । सोडा संग्रामाचा साटोप[6] ॥२२॥ तुम्हीं वारू आमुचा धरिला । हाचि अन्याय मोठा केला । दुसरा अपराध वीरें वीर धरिला । शत्रुघ्नभरतादिकरोनि ॥२३॥ तयांचा सूड मी घेईन । तुम्हां दोघां धरून नेईन । वारु आपुला सोडवीन । निजवीरांसमवेत ॥२४॥ ऐसें शक्रारीचें वचन । ऐकोनि कुश बोलिला आपण । तुमचा ठाउका अभिमान । पूर्वीच आम्हीं आयकिला ॥२५॥ तुमची कीर्ति तुम्हांप्रती । सांगतो ऐका एकाग्रचित्तीं । जैं रावणें घातली शक्ती । तैं भूमिशयन तुम्हीं केलें ॥२६॥ तेथें निवडला पुरुषार्थ । दैवें होता हनुमंत । घेवोनि आला वल्लीचा पर्वत । उपचारार्थ योजिला ॥२७॥ तूं पूर्वीच रावणभगिनी । शूर्पणखा नामें जनस्थानीं । तियेचे नासिककानीं । पुरुषार्थ थोर मिरविला ॥२८॥ विटंबोनियां तियेतें । थोर मिरविलें पुरुषार्थातें । कहाणी सांगता मातें । तें अनुभवा येईल ॥२९॥ स्त्रियेतें जें विटंबिती । तयांची थोर उपतिष्ठे कीर्ती । तेचि तुम्ही येथे मुख्य पुरुषार्थी । युद्धालागीं आले असां ॥१३०॥ ब्रह्मचर्य धरोनि व्रत । वधिला रणीं इंद्रजित । तें कांहीं न चले येथ । आतां आपणा सांभाळीं ॥३१॥ या लतामृगांचे[7] बळें । बंधु सोडवूं आलेति सबळें । भरत शत्रुघ्न वानरपाळें । पहा दशा भोगिताती ॥३२॥ आतां तुम्हां तेचि गती । विमुख झाला श्रीरघुपती । अवघी तुमची गेली शक्ती । हें निश्चितीं जाणा पां ॥३३॥

**लक्ष्मण-कुशाचे द्वंद्वयुद्ध :** ऐसीं कुशाचीं ऐकोनि वचनें । रथ प्रेरिला लक्ष्मणें । दृढ कार्मुक सत्राणें । कर्णापर्यंत ओढिलें ॥३४॥ सौमित्रकरींचा बाण । सुटका करित गर्जन। तयाचे

---

शब्दार्थ - १. आदळला, २. रक्त, ३. आपल्या सैन्यांत, ४. शिक्षा, ५. कोरडा, ६. खटपट, ७. वानरांचे.

पोटीं लक्षकोटी बाण । बाणां बाण प्रसवले ॥३५॥ जैशीं मुखांतूनि अक्षरें । निघती नानावर्णउच्चारें । तैसें सौमित्राचेनि शरें । शरांतें शर प्रसवत ॥३६॥ जैशा पर्जन्याच्या धारा । अच्छादिती गिरिवरा । तैशा सौमित्राच्या शरधारा । गगन बाणीं व्यापिलें ॥३७॥ संधान सौमित्राचें अद्भुत । देखोनि काय करी जानकीसुत । नवमुख बाण घेवोनि त्वरित । परदळावरी मोकलिला[1] ॥३८॥ शरें शरां खंडणा झाली । जैशी पंडितें मूर्खपृच्छा[2] खंडिली । हें देखोनि म्हणे ज्याची माउली । सुमित्रादेवी ॥३९॥ लक्ष्मण म्हणे अरे वीरा । धन्य धन्य तुझा गुरू पुरा । कोणे जननीचे उदरा । येवोनि वंशीं कीर्ती केली ॥१४०॥ धन्य तुझे जननीजनक । वंशीं जन्मलासी कुळटिळक । संधान करितां अचुक । हें अपूर्व देखिलें ॥४१॥ माझें जे शरसंधान । वरिच्यावरी केलें खंडन । कायसें आतां रणकंदन । आश्चर्य लक्ष्मण करिता झाला ॥४२॥ पुनरपि सुमित्रेचा बाळ । सोडिता झाला शरकल्लोळ । वरिचेवरी छेदी कुश कुशल । परम कोपा चढलासे ॥४३॥ कुश पेटला महामारीं । बोहरी करी वरिच्यावरी । गजा मारीं गजें करीं । अश्वें अश्व ठोकित ॥४४॥ एक सौमित्रासी भिडत । एक सैन्यासी मार देत । दोघीं केला प्रळयअंत । देव कौतुक पाहती ॥४५॥ कुशवीरें तये वेळे । भैरवास्त्र मोकलिलें । अष्ट भैरव पातले । तें अपूर्व परियेसा ॥४६॥ अष्टभुज करीं डौर[3] । अवनीं लागती जटाभार । हातीं त्रिशूळ करी तोमर । अश्व कुंजर पळताती ॥४७॥ अद्भुत देखोनि संधाना । त्रिशूळ लागती लक्ष्मणा । न निवारे देखोनि वायुनंदना । स्फुरणा आलें ते समयीं ॥४८॥ आवेशें करित गर्जना । धाकें भैरव घेवोनि प्राणा । पळाले लंघोनि दिशा नाना । दिग्गजांआड लपाले ॥४९॥ ऐसें देखोनि कुशवीरें । मोहनास्त्र जपोनि बीज़ाक्षरें । प्रेरिलें तेणें प्रतापकरें । पडे अंधारे लक्ष्मणासी ॥१५०॥ धूमीं[4] दाटली समस्त वीरां । हातींचीं गळालीं शस्त्रें झरारां । चाकाटलें पाहती अंबरा । एक नेत्र झांकिती ॥५१॥ एकीं दीर्घ शयन केलें । एक विस्मयातें पावले । संग्राम करूं विसरले । मौन पडलें समस्तां ॥५२॥

हनुमंताला अटक : ऐसें वर्तलें रणमंडळीं । मग दोघे बंधु तये वेळीं । काय करिते झाले ते काळीं । सुरवरीं पाहूं आदरिलें ॥५३॥ पुच्छीं धरोनि हनुमंत । कुश फरफरां ओढोनि नेत । लहूनें धरोनि सुमित्रासुत । विनोदें वनांत आणिला ॥५४॥ तयांसी बंधन पैं केलें । हनुमंतासी पुच्छीं बांधिलें । मग दोघे निघते झाले । गुरुदर्शनालागोनी ॥५५॥ सद्गुरूंसीं करोनि नमन । सांगितला वृत्तांत संपूर्ण । ऐकोनि हांसे मुनिगण । समस्त ऋषिजन सुखावले ॥५६॥ सीतेसि करोनि नमस्कार । आनंदें दोघे झाले निर्भर । टाळिया पिटिती द्विजवर । म्हणती अपूर्व वर्तलें ॥५७॥ पुढें पित्या पुत्रासीं । युद्ध होईल परमावेशीं । ऐक्य होवोनि समरसीं । चवघे जण मिळतील ॥५८॥ एका जनार्दना शरण । पुढील रसाळ निरूपण । श्रोते होवोनि सावधान । परिसा रामायण अति गोड ॥५९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणहनुमंतजुत्पतीबंधनं नाम अष्टषष्टितमोऽध्यायः ॥६८॥ ओंव्या ॥५९॥

---

शब्दार्थ - १. सोडला, २. मूर्खाचा प्रश्न, ३. डमरू, ४. अंधारी.

# अध्याय एकूणसत्तरावा

॥ श्रीजगद्गुरवे नमः ॥

## श्रीरामांना जानकी व पुत्रांची भेट

दूषणारिपुत्रीं[1] दोघीं जणी । नर वानर समरांगणीं । जीत बांधिलें कित्येक मेदिनीं । गतप्राण होवोनि ठेलें ॥१॥ अश्व गज वना आले । तेही गतप्राण होवोनि ठेले ॥१॥ अश्व गज वना आले । तेही गतप्राण होवोनि ठेले । किंचित घायाळ उरले । ते प्रवेशले अयोध्यापुरीं ॥२॥ भद्रासनीं जनकजामात । जैसा नभीं शोभे भास्वत । भोंवते ऋषी परम ज्ञानवंत । सुमंतादिक प्रधान ॥३॥ बैसले सभानायक । नगरपंडित पुराणिक । चहूं वेदांचे वेदपाठक । ज्योतिषी गायक गंधर्व ॥४॥ ऐसी सभा प्रसन्नवदन । एक करिती गायन । एक करिती शास्त्र-व्याख्यान । एक जन रंजविती ॥५॥

घायाळ सैनिकांनी त्या कुमारांविषयी श्रीरामांना निवेदन केले : येरीकडे रणींचे वीर । अशुद्धें[2] डवरिलें[3] जैसे गिरिवर । येवोनि श्रीरामासमोर । वृत्तांत सविस्तर सांगते झाले ॥६॥ म्हणती जी स्वामिनाथा । संग्रामाची परिसा कथा । शत्रुघ्नलक्ष्मणभरतां । दो कुमरीं बांधोनि नेलें ॥७॥ कपिवीर थोर थोर । तेही बंधन पावले समग्र । कित्येक घायीं झाले जर्जर । जिहीं रण सेविलें ॥८॥ वज्रदेही वायुकुमरा । बाणें उडविलें अंबरा । मूर्च्छित पडतांचि फरफरां । पुच्छीं महावीरां ओढित नेलें ॥९॥ उरले कण्हत कुंथत । कित्येक मार्गी झाले प्रेत । किंचित उरले ते येथ । भाग्येंकरोनि पावलों ॥१०॥ वयें तरी संख्या रविकळा[4] । रूप तरी मदनपुतळा । प्रतापें तरी या ब्रह्मगोळा । पालथें करिती स्वभावें ॥११॥ ऐसें दोघे वीरराणे । नेणों निर्माण केलें कोणें । दातारा त्यांचेनि स्मरणें । जीवें प्राणें न उरिजे ॥१२॥ धन्य धन्य त्यांची मातापिता । धन्य धन्य त्यांची प्रौढता । धन्य तयांसी विद्यादाता । कोण तत्वतां कळेना ॥१३॥ वय तरी दिसे लहान । करीं शोभती धनुष्यबाण । गौर श्याम सुंदर सगुण । श्रीरामजानकींसारिखे ॥१४॥ घायाळमुखींची ऐकोनि कथा । हर्ष झाला श्रीरामाचे चित्ता । खुणावोनि सद्गुरूसी बोलता । म्हणे सैन्य समर्था मारिले ॥१५॥

श्रीराम स्वतः युद्धाला निघाले : दाशरथी म्हणे सद्गुरूसी । आट[5] केला जी सैन्यासी । आतां चलावें वेगेंसीं । म्हणोनि सभा विसर्जिली ॥१५॥ प्रधानां केला हाकारा । म्हणे पालाणा रथकुंजरां । आणि देशोदेशींचे नृपवरां । ऋषीश्वरां सवें घ्यावें ॥१७॥ रथीं आरूढोनि श्रीरघुपती । समीप वसिष्ठ दुसरे रथीं । शस्त्रसामग्रीसी नाहीं मिती । वेगें भूपती निघाला ॥१८॥ रथारूढ घनसावळां । दुसरे रथीं जवळा । विश्वामित्र तोही भूपाळा-। समीप पृथक् रथीं बैसे ॥१९॥ आधींच राम घनसांवळा । कोटिलावण्याचा पुतळा । कांसे पीतांबर पिंवळा । कौस्तुभमाळा वैजयंती ॥२०॥ अंगीं अहिप्रियांची[6] उटी । तिलक मृगनाभींचा ललाटीं । कर्णी कुंडलें अतिगोमटीं । रवी कोटी प्रकाशले ॥२१॥ शुद्ध राजीवलोचन । मुकुटीं शोभती रत्नकिरण । हिरे माणिकें तेजें पूर्ण । ठायीं ठायीं शोभती ॥२२॥ ऐसा रथीं कौसल्या-नंदन । करी घेतलें धनुष्यबाण । मस्तकीं छत्र नीळवर्ण । कनकदंडें ढाळिती ॥२३॥ पुढें तरी वेत्रपाणी । मदगज पुढारले आभरणीं । सैन्य निघालें कोदंडपाणी । तयामध्ये शोभत ॥२४॥ रथ चालिले घडघडाट । नादें तडाडिलें अवनीचें पोट । गिरी पर्वत होती एकवट । ऐसें नगराबाहेर आले ॥२५॥

---

शब्दार्थ – १. रामाच्या पुत्रांनी (लहुकुशांनी), २. रक्तानें, ३. भरलें, ४. वारा, ५. नाश, ६. चंदनाची.

श्रीरामांना शुभशकुन : शकुन झाले ते अवसरीं । बाळकें घेवोनि कडेवरी । वनिता येत्या मानालंकारीं । पुढे देखिल्या ॥२६॥ कागपक्षी दक्षिणे गेले । नकुळ भारद्वाजीं डावलिलें । तास[1] वामभागीं गेलें । उजवे झाले मृगगण ॥२७॥ अपसव्य गेल्या कुरंगिणी[2] । दोघे गुरु संतोषले मनीं । म्हणती स्तोत्रमंत्रध्वनीं । शब्द गगनीं न समाती ॥२८॥ कनकमृगारी म्हणे स्वामी । नेत्र लवती उल्हासें दोनी । दक्षिण बाहु स्फुरत मनीं । आनंद थोर होतसे ॥२९॥ तरी कवण लाभ होईल । कोण सखा भेटेल । की युद्धीं जय येईल । हें मजप्रति सांगावे । ॥३०॥ तंव सद्गुरू म्हणे अवनिजापती । महिमा न कळे श्रुति नेति नेति म्हणती । तो तूं सर्वात्मा मंगळमूर्ती । आनंद चित्तीं अखंड तुझ्या ॥३१॥ ऐसें पथीं चालत । मार्ग क्रमोनियां त्वरित । आश्रम पावले वाल्मीक जेथ । तया स्थळासि पावले ॥३२॥

लवकुशांची प्रतिज्ञा व गुरूंचा आशीर्वाद : येरीकडे कथानुसंधान । लहु कुश दोघे जण । मातेप्रति प्रतापवन । काय बोलते पैं झालें ॥३३॥ मातेसी म्हणती दोघे कुमर । युद्धा आला श्रीरघुवीर । सैन्य सज्जोनि अपार । बंधु सोडविण्याकारणें ॥३४॥ आतां यासीं युद्ध करूं । श्रीरामातें जीत धरूं । वरकड सैन्य जीवें मारूं । हाचि आमुचा निश्चय ॥३५॥ ऐसी प्रतिज्ञा करून । शृंगारिले दोघे जण । करीं घेवोनि धनुष्य बाण । जानकीस प्रदक्षिण पैं केलें ॥३६॥ वंदोनियां श्रीगुरूसी । आज्ञा पुसोनि मातेसी । वाल्मीक म्हणे तयांसी । निर्वाण येथें करावें ॥३७॥ शंभु म्हणे दाक्षायणीसी । अपूर्व कथा परिसेयीं । जें वर्तलें नाहीं सृष्टीसी । देखिलें ना ऐकिलें ॥३८॥ युद्ध पित्यापुत्रांसी जाण । सूर्यवंशीं होईल दारुण । तें पाहूं चला हो विंदान । वाल्मीकाचे आश्रमीं ॥३९॥ पुढें श्रीरामा पुत्रां होईल भेटी । ऐसी हे कथा सुरस मोठी । तव पार्वती म्हणे जी धूर्जटी । कोणे समयीं स्वामिया ॥४०॥ श्रीराम कोण कैंचा पुत्र । कोण वंश कोण गोत्र । तुम्ही जपतसां जो श्रीराममंत्र । तोचि कीं काय स्वामिया ॥४१॥ त्रिपुरारी म्हणे तोचि जाण । जयाचें आम्हीं अखंड ध्यान । तोचि श्रीराम ब्रह्म पूर्ण । कार्याकारणें अवतरला ॥४२॥ याहूनि सार दुसरें । नाहीं म्हणोनि म्यां धरिलें हरें । तंव गिरिजा म्हणे दातारें । पुढें कथा सांगावी ॥४३॥ पार्वती म्हणे महादेवो । चला विमानीं बैसों पाहों । मग तो योगियांचा रावो । चरित्र पाहूं तेथें आला ॥४४॥ श्रीरामा पुत्रां कैसी भेटी । पुत्रांसहित सीता गोरटी । श्रीरामीं ऐक्य ते कथाकसवटी । मजप्रती सांगावी ॥४५॥ तंव येरीकडे लहुकुश चालिले । सिंहनादें गर्जिन्नलें । शरकार्मुक[3] टणत्कारिलें । तंव दोघे देखिले श्रीरामें ॥४६॥ अवलोकोनि दोघां जणां । विस्मित झाला रामराणा । कैसे धरिलें इतुकिया सैन्या । हे तरी दोघे बाळक ॥४७॥ सुंदर अति राजसे । याचें बाण रुतले कैसे । बंधु धरिले ते सरसे । हें आश्चर्य वाटतसे ॥४८॥ यांसी युद्ध आपण करणें । तें होय लौकिकीं लाजिरवाणें । युद्धीं आपण विमुख होणें । तरी सुटका नव्हे बंधूंसीं ॥४९॥ मग रथ प्रेरिला सामोरा । वेगळें केलें येरां वीरां । कोप आला श्रीरामचंद्रा । भेणें वसुंधरा[4] थरारिली ॥५०॥ वरोनि सुधापानी पाहती । एकमेकां परस्परें बोलती । कोपलिया अवनिजापती । कैसे वांचती दोघे कुमर ॥५१॥ तंव गुरु बृहस्पति बोलत । दोघां भय नाहीं निभ्रांत । राया राघवाचे सुत । अति महाबळियाढे ॥५२॥ घटश्रोत्रारीनें[5] धनुष्य वाहिलें । म्हणे सावध व्हा रे वहिले । तुम्हीं पुरुषार्थ थोर दाखविले । ते आतां कळले रणरंगीं ॥५३॥ कपटी वाल्मीक ऋषीश्वर । येणेंचि महा

---

शब्दार्थ – १. चाष पक्षी, २. हरिणी, ३. धनुष्यबाण, ४. पृथ्वी, ५. कुंभकर्णशत्रूने.

चालविलें वैर । येरवीं कैंचे कोठील वीर । यांसी कोण गणिताहे ॥५४॥ सहोदर माझे धरोनि जाण । आणि वानरां केलें बंधन । यासी मूळ वाल्मीक ब्राह्मण । आतां लुटीन आश्रम याचा ॥५५॥ वाल्मीकीनें हे संग्रहिले । शस्त्रास्त्रविद्ये निपुण केले । चेष्टवोनि बंधू धरविले । या बाळकांकरोनी ॥५६॥ आतां बंधूंचें उसणें घेईन । तुम्हां दोघां धरून नेईन । ऋषिआश्रम भंगीन । अवघे करीन निष्कंटक ॥५७॥ चापशरपाणीचें ऐकोनि वचन । कुश बोलता झाला जाण । तुमचा प्रताप दारुण । आम्हां श्रुत झालासे ॥५८॥ तो ऐकावा रघुराजें । घरच्या सांडोनियां भाजे [1]। लोकीं यश मिरविजे । हेंचि आश्चर्य वाटतें ॥५९॥ बापुडी ताटका मारिली । रावणभगिनी विटंबिली । ऐसी तुमची कीर्ति ऐकिली । जगामध्यें प्रसिद्ध ॥६०॥ ऐसें तुम्ही वडील दारुण । आम्हां दिसतसां पित्यासमान । यालागीं राखितों महिमान । आतां वाल्मीका शरण तुम्हीं यावें ॥६१॥ सद्गुरुसी न रिघतां शरण । कदा न तुटे देहबंधन । तया नरा अंध:पतन । पापिया पूर्ण तो सृष्टीं ॥६२॥ माझा सद्गुरु प्रसिद्ध । जो कां विबुधादिकां वंद्य । तयाचा प्राप्त प्रसाद । त्याचेनि युद्ध करितो आम्ही ॥६३॥ मग बोलिला दूषणारी । आतां माझा यावा[2] सांवरीं । नाहींतरी पळसी ऋषींभीतरीं । सांडोनियां धनुष्यबाण ॥६४॥

श्रीराम–कुश अस्त्र युद्ध : ऐसें बोले श्रीरघुपती । धनुष्य चढवोनियां सीतीं । बाण सोडिले अमित क्षितीं । शर शरांतें प्रसवले ॥६५॥ बाणमय झालें भूमंडळ । अष्ट दिशा कुळाचळ । आणि जेवढा ब्रह्मांडगोळ । बाणें जळस्थळ कोंदलें ॥६६॥ ऐसें अद्भुत येतां बाण । वरचेवरी तोडिले कुशें जाण । उदय होतां रविकिरण । उडुगण[3] लोपती आपसया ॥६७॥ बाण तोडिले देखोनि श्रीरामें । विष्णुशस्त्र घेतलें नेमें । जपोनियां बीजें उत्तमें । कुशावरी मोकलिलें ॥६८॥ पृथ्वी झाली विष्णुमय । विष्णुमय झालें भुवनत्रय । शंख चक्र गदा अभय । चतुर्भुज प्रगटलें ॥६९॥ विष्णुमय देखोनि अवनी । कुशवीरें तये क्षणीं । लक्ष्मीअस्त्र लाविलें गुणीं । रमामय मेदिनीं पैं केली ॥७०॥ कमलामय अवघी सृष्टी । कमलामय नभाचें पोटीं । कमलामय पर्वतांच्या पृष्ठीं । कनकताटीं आरतिया ॥७१॥ त्या ओवांळिती विष्णूसी । शंभूसि पार्वती जैसी । कीं शची ओंवाळी वृत्रारीसी । ऐसें तेथें वर्तलें ॥७२॥ ओंवाळोनियां विष्णूसी । रमेसहित वैकुंठासी। गेले विष्णू देखोनि रामासी । अति आश्चर्य वाटलें ॥७३॥ मग बोले श्रीरामराणा । धन्य धन्य तुझा पुरुषार्थपणा । जेणें विद्या शिकवली तोही धन्या । यो भूगोळामाझारीं ॥७४॥ श्रीराम म्हणे कुशासी । मज निवविलें करोनि युद्धासी । नमस्कार तुझिया गुरूसी । तूं ब्रह्मबीज नव्हेसी निर्धारें ॥७५॥ कोण तुझा जनक जननी । हें मज सांगें त्वरेंकरोनी । तूं क्षत्रियाचा निश्चयेनी । मज मानसीं गमताहे ॥७६॥ तंव कुश बोले तये वेळीं । आम्ही काय जाणों कुळवल्ली । आणि सांगों नये काळीं । युद्धामाजी विचरतां ॥७७॥ जातिकुळी काय चाड तुम्हां । युद्ध करावें जी श्रीरामा । आतां पहा आमच्या पराक्रमा । आणि विद्या वाल्मीकाची ॥७८॥ तुमचा पराक्रम अति प्रसिद्ध । ठकोनि वाळीचा केला वध । सुग्रीवा देवोनि राजपद । अपकीर्तीतें जोडिलें ॥७९॥ सिद्धी नेला गुरूचा याग । तुमचा सहोदर निसुग । क्षणें क्षत्रीं क्षणें जोग । क्षणें तापसी जटाधारी ॥८०॥ तुमचा होता भरंवसा । त्या वीरीं धरिल होती आशा । युद्ध करितां झाली निराशा । श्रीराम सोडवी ना म्हणोनी ॥८१॥ आम्ही म्हणतो क्षत्री श्रीराम । तंव हा फिटला अवघा भ्रम । मागील यशाचा

शब्दार्थ - १.स्त्रीला, २. आवेश, ३. पक्षी.

वीरधर्म । याचपरी कळला जी ॥८२॥ ऐसें कुश बोलतां । हासें आलें श्रीरघुनाथा । निका[१] क्षत्री होसील आतां । तरी हा बाण सांभाळीं ॥८३॥ बीजाक्षर जपोनि राजीवनयनें । व्याघ्रास्त्र सोडिलें कोपें दारुणें । येरें सिंहास्त्र सोडोनि तत्क्षणें । व्याघ्रास्त्र अवघें निवारिलें ॥८४॥ सर्वेचि कोपोनि श्रीरघुपती । शर सोडिले नेणों किती । कुशा आलिंगोनि रघुनाथभाती । प्रवेशती ते काळीं ॥८५॥ कुशाचे करींचे सुटती बाण । श्रीरामासी करिती नमन । सर्वेचि येती परतोन । कुशाचे भातीं ते रिघती ॥८६॥ शर सोडी रामचंद्र । तयांचे कुशास अलंकार । पुत्राचे शर श्रीरघुवीर । ओंवाळीन नमस्कारिती ॥८७॥

**युद्ध थांबविण्याचा ऋषींचा रामांना आदेश :** ऐसें देखोनि सकळ ऋषी । आश्चर्य करिती मानसीं । ते समयीं विश्वामित्र रायासी । बोलता झाला कांहींएक ॥८८॥ ऋषि म्हणे श्रीरघुनाथा । संग्राम नको करूं आतां । येरू म्हणे जी ताता । बंधू कैसेनि सुटतील ॥८९॥ बंधु आणि अश्व वानर । त्यांचें सुटकेचा कोण प्रकार । तंव वसिष्ठ ऋषीश्वर । हास्यवदनें बोलला ॥९०॥ वसिष्ठ म्हणे वाल्मीकासी । बोलावोनि आणा या ठायासी । तो सांगेल निश्चयेंसीं । त्या कार्यासी करावें ॥९१॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन । श्रीरामें ठेविलें धनुष्यबाण । वाल्मीक ऋषि पाचारून । सभास्थानीं बैसविला ॥९२॥

**वाल्मीकींचें आगमन आणि सर्वांची मुक्तता :** वाल्मीकें खुणाविलें कुमरा । सोडविलें भरत शत्रुघ्नादि वीरां । अश्व सोडोनियां वनचरां । समस्तांतें मुक्त केलें ॥९३॥ वाल्मीक ऋषि म्हणे श्रीरामासी । हे तुझें दोघे पुत्र परियेसी । येरू म्हणे ठाव नाहीं भार्येसी । पुत्र कोणाचे ॥९४॥ आधीं असलिया स्त्रीरत्न । तंव देखावें पुत्रनिधान । ते समयीं ब्रह्मनंदन[२] । नारद जाण तेथे आला ॥९५॥ हांसोनिया नारद मुनी । लटिकें वैराग्य चापशरपाणी । म्हणे श्रीरामालागूनी । आम्हां मूढांसी दाविसी ॥९६॥ तंव कुंभोद्भव म्हणे श्रीरामा । पुराणपुरुषा मेघश्यामा । पुत्र तुझें हे पुरुषोत्तमा । हें सौमित्रा पुसावें ॥९७॥ राजीवनेत्रें सौमित्रातें । पुसों आदरिलें भावार्थे । तंव येरू गहिंवरोनि चित्तें । सद्गदकंठ दाटला ॥९८॥ सौमित्र होवोनि सावधान । बोलता झाला पूर्वकथन । स्वामीनें आज्ञा देवोन । सीता वना पाठविली ॥९९॥ ते नेवोनियां वनवासीं । सोडितां जानकी मजसीं । बोलिली गर्भिणी तीनमासी । सौमित्रा तुम्हीं जाणावें ॥१००॥ अवनिजेचें ऐकोनि वचन । मग राखिलें तिचे प्राण । हृदयीं थोर दुःख पावोन । स्वामिचरणाजवळी आलों ॥१॥ याउपरी वाल्मीकें बोललें । माझे शिष्य वनफळां गेले । तिहीं सीतेसी देखिलें । आक्रंदता वनवासीं ॥२॥ तदुपरी आश्रमा आणिली । आम्ही जानकी ओळखिली । सर्वेचि मजसीं बोलिली । म्हणे मुनि मी गर्भवती ॥३॥ माझे आश्रमीं पूर्ण दिवस । क्रमोनि भरले नवमास । प्रसूतिकाळीं लहु कुश । पुत्र दोघे जन्मले ॥४॥ पुत्र झाले सुलक्षण । दिवसेंदिवस थोर होवोन । धनुर्विद्या अभ्यासून । सीतेसहित होते येथें ॥५॥

**वाल्मीकींनी श्रीरामांची लव-कुश, सीतेची भेट करवून दिली :** तुमचे पुत्र निपुण केले । आतां सांभाळिजे आपुले । म्हणोनि दोघां भेटविलें । श्रीरामासी ते समयीं ॥६॥ श्रीराघवें दिधलें आलिंगन । सजळ[३] दोनी झाले नयन । क्षण एक तटस्थ होवोन । मग मांडिये बैसविलें ॥७॥ आनंद झाला श्रीरामासी । देखोनियां लहुकुशांसी । पुनरपि चुंबन देवोनि त्यांसी । करें कुरवाळी मस्तक ॥८॥ भरत शत्रुघ्न लक्ष्मण । आणि सकल वानरसैन्य । लंकाधिपती

---

शब्दार्थ - १. खरा, २. ब्रह्मदेवाचा पुत्र (नारद), ३. आनंदाश्रूंनी भरलेले.

बिभीषण । समस्त तयांसी भेटविले ॥९॥ हनुमंत सुग्रीव जांबवंत । आनंदें लहुकुश भेटत । आणि ऋषी वसिष्ठादि महंत । तयां नमस्कार केला पुत्रीं ॥११०॥ नारद म्हणे वाल्मीकासी । वेगीं आणवीं जानकीसी । मोतियांचा चौक वसिष्ठ ऋषी । घालिता झाला ते वेळीं ॥११॥ आणविली जनकबाळा । आसवें आलीं तिच्या डोळां । येरी लागली चरणकमळा । वसिष्ठादि ऋषींचें ॥१२॥ मग नमस्कारोनि श्रीरघुपती । वामांगीं बैसली सीता सती । ऋषी जयजयकारें गर्जती । विजयी रघुपती तिहीं लोकीं ॥१३॥ जैसा कैलासीं त्रिपुरारी । अर्धांगीं घेवोनियां बैसे गौरी । गणेश आणि तारकारी । दक्षिणांगीं शोभत ॥१४॥ ऐसा झाला महोत्सव । भार्यापुत्रांसहित देवाधिदेव । विजयी झाला ऋषिसमुदाव । जयजयकारें गर्जिन्नले ॥१५॥ देव करिताती स्तुती । नानापरींची वाद्यें वाजती । विमानी होत्या सुरांच्या पंक्ती । पुष्पवर्षाव तिहीं केला ॥१६॥ मग लक्ष्मणभरतशत्रुघ्नांसी । गहिंवर न धरवे मानसीं । सत्वर उठोनि जानकीसी । साष्टांगेंसीं नमस्कारिलें ॥१७॥ मग पाहोनियां सुमुहूर्त । रथ पालाणिले त्वरित । रथीं बैसोनि ऋषी समस्त । अयोध्यापंथें निघाले ॥१८॥ समस्त परिवारेंसीं जाण । रथीं आरूढलें श्रीराम जाण । एके दिवशीं अयोध्याभवन । निजसैन्येसीं प्रवेशले ॥१९॥ भवनीं प्रवेशली सीता । कौसल्यादिकरोनि समस्ता । जानकीस आलिंगन झाल्या देत्या । म्हणती कष्टली सीता वनवासीं ॥१२०॥ कौसल्या आरती घेवोनि करीं । तिघां जणांतें लोण उतरी । हर्ष न समाये अंबरीं । लहुकुशांतें देखोनी ॥२१॥ येरीकडे श्रीरामराणा । आज्ञा देवोनि समस्त जनां । पाठविले निजस्थानां । ऋषी राजे सकळिक ॥२२॥ आज्ञा देवोनि कपिगणांतें । पाठविले निजस्थानांतें । बिभीषणें नमस्कारोनि राघवातें । निजनगरातें निघाला ॥२३॥ बंधुभार्यापुत्रांसहित । अयोध्येसी श्रीरघुनाथ । राज्य करितां सुखें स्वस्थ । पुढील चरित्र अवधारा ॥२४॥ एका जनार्दना शरण । पुढील कथा अति पावन । जिचें करितां स्मरण । भवबंधन स्वप्नीं नाहीं ॥१२५॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामजानकीपुत्रदर्शनं नाम एकोनसप्ततितमोऽध्यायः ॥६९॥ ओंव्या ॥१२५॥

## अध्याय सत्तरावा

॥ श्रीसच्चिदानंदाय नमः ॥

### कैकेयीला लंकादर्शन

जानकीसहित श्रीरघुपती । सुखस्वानंदें[1] अयोध्येप्रती । राज्य करितां स्वधर्मस्थिती[2] । पापवदंती[3] राज्यीं नाहीं ॥१॥ देशींचे लोक पुण्यशील । स्वधर्मीं रत द्विज सकळ । अग्निहोत्रें करोनियां काळ । श्रीरामनामीं कंठिती ॥२॥ घरोघरीं तुळसीवृंदावनें । नित्य करिती हरिकीर्तनें । ठायीं ठायीं होती पुराणें । शास्त्रव्याख्यानें घरोघरीं ॥३॥ आणिक जे इतर लोक । तेही नगरीं स्वधर्मरक्षक । भूतदयासुत दीनपाळक । उपकारी अत्यंत पुढिलांसी ॥४॥ भरतशत्रुघ्न कैकेयीनंदन । सुमित्रेचा लक्ष्मण । श्रीरामसेवे अनुदिन आसक्त । जाण मन त्यांचें ॥५॥ प्रधानवर्ग सकळिक । नगरींचे नगरलोक । बंदिजन[4] सर्व सेवक । श्रीरामउपासक अनुदिनीं ॥६॥ अष्टदळकमळकळिकेमाझारीं । जनकीसमवेत कनकमृगारी । नीळवर्ण छत्र शोभे

---

शब्दार्थ - १. निजानंदसुखांत, २. धर्मन्यायमार्गानें, ३. पापाची वार्ता, ४. भाटमंडळी.

शिरीं । बंधु परिवारी उभे तेथें ॥७॥ ऐसा सुंदर राजीवलोचन । श्यामसुंदर धनुष्यबाण । ठाण मांडोनि विराजमान । त्याचें ध्यान करिताती ॥८॥ योगी दिगंबर तापसी । सिद्ध साधक महंत ऋषी । आश्रयोनि श्रीरामासी । अयोध्येसी राहिले ॥९॥ ऐसिये अयोध्याभवनीं । दुःख दारिद्र्य न देखिजे स्वप्नीं । पाप कैसे तें नेणती मनीं । समाधानी चित्सुखें ॥१०॥ कित्येक काळपर्यंत । राज्य करी श्रीरघुनाथ । पुढें कथा वर्तली अद्भुत । सावधानचित्त अवधारा ॥११॥

**लंका पहावयाची कैकयीला इच्छा, विमानातून ती लंकेला निघाली :** कैकयी म्हणे श्रीरामासी । रावणाची लंका आहे कैसी । ते मज सांगावी परियेसीं । समुद्राचा जिसी परिघ असे ॥१२॥ लंका कैसी सुवर्णाची । कैसा त्रिकूट किती उंची । लांब रुंद गृहें राक्षसांची । कोणेपरीचीं आहेत कैसीं ॥१३॥ निकुंभिळा शोभायमान । जेथें वसे रावणनंदन[१] । जेणें विबुध केले दीन । शचीपति इंद्रपदाहून उतरविला ॥१४॥ सुवेळेसी कैसी रचना । जेथें होतासि रघुनंदना । जेथोनि पहातां लंकाभवना । सर्व रचना दिसे स्पष्ट ॥१५॥ कैसें तें संग्रामस्थळ । जेथें रावणादि राक्षस प्रबळ । दीर्घ विकटमुखाचे विशाळ । कुंभकर्णादि थोर थोर ॥१६॥ अशोकवनाची रचना । जेथें होती पद्मनयना । परिवारित राक्षससेना । त्रिजटा आदिकरोनि ॥१७॥ ते लंका पाहों निजदृष्टी । ऐसी कैकेयीस उत्कंठा मोठी । हें श्रीरामें जाणोनिया पोटीं । मातेप्रति बोलता झाला ॥१८॥ अवो जननीये अवधारीं । लंका पहावया उत्कंठा थोरी । वर्ततसे तुमचे जिव्हारीं । तरी प्रधानासमवेत जाइजे ॥१९॥ पाहोनियां लंकाभवन । शीघ्रवत यावें आपण । ऐसें श्रीरामें आज्ञापून । पुष्पकावरी[२] बैसविली ॥२०॥ सवें देवोनि नाना मंत्री । लंके निघाली कैकेयपुत्री । घेतली मंथरा अपवित्री । कलहकारिणी पुनरपि । मायेसवें पूर्ण अविद्या । तेंवी कैकेयीपासीं मंथरा कुविद्या । जेंवी अधमा आवडे अविद्या[३] । परापवादालागूनी ॥२२॥ तेंवी कैकेयी निजविमानी । पाहें चालली लंका भवनीं । मार्गी आकाशा पाहे नयनीं । दश दिशा अवलोकित ॥२३॥ ऐसें चालत विमान । नाना देश दुर्गे लंघून । पुढे देखिलें लंकाभवन । कनककळशीं विराजित ॥२४॥ देखोनियां लंकाभवना । पारणें झालें कैकेयीनयनां । म्हणे धन्य धन्य दशानना । नांदणूक ये ठायीं ॥२५॥ प्रसन्न करोनि उमापती । शिरीं पूजिला कैलासपती । धन्य धन्य रावणाची भक्ती । उपमा त्रिजगतीं असेना ॥२६॥ धन्य पौलस्तीचें[४] तप । धन्य पौलस्तीचा जप । धन्य पौलस्तीचा प्रताप । बंदी[५] सुरवर जयाचे ॥२७॥ धन्य रावणाची संपत्ती । धन्य रावणाची संतती । जेणें समरांगणीं शचीपती । जिंतोनि कामारा पैं केला ॥२८॥

**बिभीषणाला भेटीस येण्यास कळविले. त्याचे आगमन :** ऐसें आश्चर्य करी श्रीराममाता । संज्ञेनें पाठविलें दूता । मात जाणविली लंकानाथा । दशरथवनिता आलीसे ॥२९॥ भ्रूलतासंज्ञेनें सेवक । प्रवेशले जेथें लंकानायक । भोवतें राक्षसांचे कटक । रत्नसिंहासनीं बिभीषण ॥३०॥ दूर्ती बिभीषण कैसा देखिला । जैशा शशी गगनीं मिरवला । कीं उत्तानचरणाचा[६] तान्हुला । अढळ पदीं शोभतसे ॥३१॥ कीं पातलिया वसंत । वनश्रीमाजी विराजत । श्रीरामाचा शरणागत । सिंहासनी शोभतसे ॥३२॥ कीं गगनामध्ये दिनकरू । कीं कुळाचळांमध्यें मेरू । कीं पक्षियांमाजी खगेश्वरू । तैसा लंकेश्वरू राजसांमध्ये ॥३३॥ कीं तारागणामाजी धुरू । अब्धिमाजी क्षीरसागरू । कीं दैत्यांमाजी कश्यपकुमरू । तैसा नैर्ऋतेश्वरू[७] तयांमाजी ॥३४॥

---

शब्दार्थ – १. इंद्रजित, २. पुष्पक विमानांत, ३. कुतर्क, ४. रावणाचे, ५. स्तुतिपाठक, ६. ध्रुव, ७. राक्षसराज (बिभीषण)

ऐसा बिभीषण धर्ममूर्तीं । दूतीं देखोनि प्रणिपात विनंती । कर जोडोनि आदरें स्तुती । करिती झाला मुखकमळें ॥३५॥ म्हणे राजाधिराजा लंकापती । अति श्रेष्ठ धर्ममूर्ती । कैकेयीनें पाठविलें तुम्हांप्रती । आशीर्वाद देवोनि ॥३६॥ कैकेयी म्हणाल आहे कोण स्थळीं । तरी प्रधानांसहित नगराचे पाळीं । तेणें पाठविलें तुम्हांजवळी । बोलवावया तुम्हांतें ॥३७॥ दूतमुखींचें ऐकोनि वचन । बिभीषणाचें उल्हासे मन । सेना सेवक राक्षसजन । कैकेयीभेटी निघाला ॥३८॥ सहपरिवारें शरणागत । भरतमातेच्या भेटी उल्हासत । चालिला जैसा आनंदभरित । चकोर चंद्राचिये प्रीतीं ॥३९॥ ऐसियेपरी बिभीषण । श्रीराममातेस भेटोन । करोनि साष्टांग नमन । आनंदें पूर्ण निवाला ॥४०॥ बिभीषण जोडल्या करीं । कैकेयीस प्रणिपात करी । म्हणे स्वामिनी मज दीनावरी । येवोनि कृपा थोर केली ॥४१॥ आतां चलावें मंदिरा । मज दीनावरी कृपा करा । ऐसी प्रार्थोनि नृपसुंदरा । परिवारेंसीं गृहा नेली ॥४२॥ दीर्घ उपचार करोनी । पूजिली ते भरतजननी[1] । समस्तें भोजन सारोनी । विडे दिधले सकर्पूर ॥४३॥ कैकेयीस देवोनि दिव्यांबरें । मग प्रार्थिली मधुरोत्तरें । म्हणे माते कोण कार्यार्थ श्रीरघुवीरें । तुम्हां येथें पाठविलें ॥४४॥ किन्निमित्त आगमन । तें मजप्रति कृपा करोन । विदित करावें स्वामिनीनें । शरणागत म्हणोनी ॥४५॥ ऐकोनि बिभीषणाची विनंती । कैकेयी बोले तयाप्रती । म्हणे समस्त लंका पहावयार्थीं । येथें येणें राजेंद्रा ॥४६॥ मारोनि रावण कुंभकर्ण । लंका तुज दीधली दान । ऐसें ऐकोनि उत्कंठित मन । पहावया आलें लंकेतें ॥४७॥

बिभीषणाचा, कैकेयीला संपूर्ण लंका दाखविण्याचा प्रधानांना आदेश : कैकेयीची ऐकोनि वचनावळी । बिभीषण सांगे प्रधानांजवळी । भरतमातेतें लंका समूळीं । दाखवा सकळ भवनादिक ॥४८॥ निकुंभळा सुवेळा पडलंका । त्रिकूटादिकरोनि दावा लंका । जेथें मारिलें रावणादि सैनिकां । तींही स्थळें दावावीं ॥४९॥ समस्त प्रधानांची भवनें । आणि निद्रा केली कुंभकर्णें । तीं स्थळें आणि नाना उपवनें । अशोकवनें दाखवावीं ॥५०॥ बिभीषणआज्ञा वंदोनि शिरीं । बैसे विमानीं जिचा पुत्र लवणारी[2] । लंकादि स्थळें पहावया ते अवसरीं । निघती झाली ते काळीं ॥५१॥ प्रधान म्हणती राजमाते । पडलंका पाहें जाण निरुतें । प्रथम क्रौंचा हनुमंतें । ये स्थळीं मारिली ॥५२॥ तेथोनि प्रवेशला लंकापुरीं । वळंघला गृहावरी । तें हें राजभवन निर्धारीं । राघवारी वसे येथें ॥५३॥ हें रावणाचें होमस्थान । तेथें करीत होता शयन । हें सभास्थळ हें सिंहासन । विराजमान येथ राक्षसेंसीं ॥५४॥ हीं प्रहस्तादि प्रधानांचीं मंदिरें । येथें नाना जोशी भट वेव्हारें । हीं अग्निहोत्र्यांचीं होमस्थळें अपारें । हे हाटबाजार लंकेचे ॥५५॥ दाखविली शक्रजिताची पुरी । जेथें होम करित होता सुरारी । सौमित्रें साधोनि रणचत्वरीं । मारिला पशूसारिखा ॥५६॥ तेथोन पुढें चालिलें विमान । देखिलें सुवेळेचें वन । कैकेयी म्हणे शिखर मनोरमण । याचें नाम काय असे ॥५७॥ प्रधान म्हणती राजमातें । वानरांसहित श्रीराम येथें । राहोनियां राक्षसांतें । निर्दळिलें समरांगणीं ॥५८॥ पैल रुद्रकूटपर्यंत । येथोनि उडाला वायुसुत । लंका जाळोनि अशोकवनांत । पादप[3] उपडोनि पैं गेला ॥५९॥ ऐसीं पाहोनि स्थळांतरें । मागुतीं प्रवेशली लंकापुर । तंव देखिलें मंदिर । हें कुंभकर्णवीराचें ॥६०॥ प्रधान म्हणती राजबाळें । येथें शयन केले कुंभकर्णें विशाळें । हें

शब्दार्थ – १. कैकेयी, २. लवणशत्रू शत्रुघ्न, ३. वृक्ष.

तयाचें अंत:पुर स्त्रिया बाळें । ये भवनी वसती माते ॥६१॥ मग ते दशरथसुंदरी । प्रवेशली कुंभकर्णमंदरीं । तंव त्या कुंभकर्णाची अंतुरी[1]। कैकेयीदर्शना पैं आली ॥६२॥ भेटोनियां कैकेयीतें । अति सन्मानिलें आदरें बहुतें । भरतमाता म्हणे वज्रसारेतें । कैसा काळ प्रवर्तला ॥६३॥ विपरीत समयो पातला । तैं जंबुकीं सिंह साधिला । पिपीलिकीं[2] मिळोनि वेढिला । कद्रुतनयो[3]॥६४॥ तैसें झाले लंकेआंत । श्रीरामें वेधिला तुझा कांत । इतकियास मूळ शरणागत। राक्षसां अंत त्याचेनि ॥६५॥ श्रीरामा भेदोनि बिभीषण। मारविलें राक्षस दारुण । बंधुपुत्रासहित दशानन । समरांगणीं पाडिला ॥६६॥ आपण झाला राज्याधिकारी । निराक्षस केली पुरी । तंव बोलता ते अवसरीं अष्टशतवर्षी कुमार आला ॥६७॥

मूळकासुराची माहिती : तयासी देखोनि कैकेयी । वज्रसारेसि पुसे पाहीं । हा कुमार कोणाचा ये समयीं । अतिसुंदर दिसताहे ॥६८॥ रूपें ठाणें अति सुंदर गुण । पराक्रमें दिसे पंचानन । याची जननीजनक कोण । मजप्रती संपूर्ण सांगावें ॥६९॥ ऐकोनि कैकेयीच्या वचनासी । वज्रसारा सांगे सर्व वृत्तांतासी । सांगों आदरिलें परियेसीं । सावकाशीं अवधारिजे ॥७०॥ वज्रसारा म्हणे कैकेयीमाते । ऐकें याचिया कथनातें । मूळकासुर नाम यातें । प्रसिद्ध सर्वांतें विदित असे ॥७१॥ हा पितयाचे मूळीं लागला । म्हणोनि याचा त्याग केला । परी बाहेर वाढिन्नला । येरा पोराचिये घरीं ॥७२॥ मूळीं लागोनि पितयातें । ममरण झालें राघवहस्तें । क्षयो झाला सर्व राज्यातें । रावणादिकरोनि ॥७३॥ मूळनक्षत्रें शांति केली । राक्षससेना निर्दाळिली । रावणाची कुळवल्ली । आहाळली राघवाग्नीनें ॥७४॥ इतुकियासरी कारण हा मूळकासुर । हा जाणिजे माझा कुमर । यासि देखतां तप्त शरीर । होत आहे साजणी ॥७५॥ वंशा झाली सर्व शांती । मूळ नक्षत्रासी ऐसी गती । हें होणार अनादि निश्चितीं । भविष्य वाल्मीकी वदलासे ॥७६॥

मूळकासुराला तपश्चर्येला पाठविण्याचा कैकेयीचा उपदेश : भरतमाता म्हणे कुंभकर्णप्रिये । यासी तपा पाठवावें सये । तप केलिया फळ प्राप्त होये । लंकेचिया राज्याचें ॥७७॥ प्रसन्न केलिया कैलासपती । लंकाराज्य ऐश्वर्यसंपत्ती । बिभीषणाची याप्रती । देईल निश्चितीं साजणी ॥७८॥ नाहीं तरी संतोषोनि विश्वनाथ । सामर्थ्य देईल अद्‌भुत । आपुले बळें लंका प्राप्त । होईल निश्चित साजणी ॥७९॥ ऐसें संवादोनि कैकेयी । निघाली बिभीषणमंदिरा पाहीं । बिभीषणें भेटोनि ते समयीं । अति आदरें पूजिली ॥८०॥ पूजोनियां श्रीराममाते । समर्पिलीं नाना वस्त्रें। कैकेयी म्हणे बिभीषणातें । अशोकवन पाहूं पां ॥८१॥ बिभीषणासमवेत कैकेयी । प्रवेशली अशोकवनाचे ठायीं । पाहती झाली ते समयीं । नाना परींच्या वृक्षांतें ॥८२॥ कैलासींच्या संपत्तीतें । रावणें मागोन आणिलें येथें । इंद्र गांजोनि नंदनवनींच्या वृक्षांतें । बळें लंकानाथें आणिलें ॥८३॥ नाना परींच्या वापी पोखरणी[4] । जेथील अमूप नाटोपे पाणी । देवालयें गोपुरें ऊर्ध्व गगनीं। उंच ऐसीं रत्नकळशीं ॥८४॥ बिभीषण म्हणे रावणारिमाते । या वृक्षातळीं रावणें सीतेतें । भोवतीं राक्षसी ठेविल्या होत्या येथें । एक वस्त्रेंसीं षण्मास ॥८५॥ भोंवत्या राक्षसी दारुण । सीतेसी करिती रक्षण । हनुमंत या वृक्षावरून । जानकीस भेटला ॥८६॥ ऐसी विवंचना लंकानाथें । सांगितली कैकेयीतें । सुखावोनि अत्यंत चित्तें । परमानंद पावली ॥८७॥ कैकेयी म्हणे बिभीषणा । मी जाईन अयोध्याभवना । तुम्हीं क्षेम कल्याण लंकाभवना । राज्य करावें स्वस्थानीं ॥८८॥ आज्ञा

शब्दार्थ – १. स्त्री, २. मुंग्यांनी, ३. सर्प, ४. पायऱ्यांच्या विहिरी.

घेवोनि बिभीषणाची । अयोध्ये निघाली जननी भरताची । पुढील कथा सुरस रुची । यावी मनाची करून सेवा ॥८९॥ एका जनार्दना शरण । अवलोकूनि लंकाभवन । कैकेयी प्रवेशली अयोध्ये जाण । श्रीरघुनंदन जेथें वसे ॥९०॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां कैकेयीलंकावलोकनं अयोध्यागमनं नाम सप्ततितमोऽध्यायः ॥७०॥ ओंव्या ॥९०॥

## अध्याय एकाहत्तरावा

॥ श्रीशिवाय गुरवे नमः ॥

### मूळकासुराला लंकेची प्राप्ती

**व्रजसारेकडून मूळकासुराचा धिःकार :** येरीकडे अनुसंधान । रम्य रामायण पावन । श्रवणें भवदोषखंडण । श्रवणमात्र केलिया ॥१॥ कैकेयीनें प्रबोधोनि कुंभकर्णपत्नीतें । आपण गेली अयोध्येतें । मागें वर्तलें तें सावचित्तें । श्रोतृजनीं अवधारिजे ॥२॥ वज्रसारानामें कुंभकर्णजाया । निखंदोनि[1] बोले निजतनया । म्हणे पुत्रा तुझा जन्म वायां । भूमिभार झालासी ॥३॥ मूळीं लागोनि सर्व शांती । केली आपुल्या पित्याचे संपत्ती । अभाग्यें उरलासि क्षितीं । आम्हां दुःख दावावया ॥४॥ जरी जन्मतासी पाषाण । तरी सार्थक होतें जाण । तुज विवोनि वंध्यापण । माझें न चुके पापिष्ठा ॥५॥ जाय शिरीं घालीं पर्वत । नातरी करीं पर्वतपात । विष भक्षोनि प्राण निश्चित । सोडोनि देई पापिष्ठा ॥६॥ तुझिया पितृव्याची राज्यसंपत्ती । तुज जन्मतां गेली भस्मांतीं । ऐसा अधम वंशाप्रती । जन्मलासी पापिष्ठा ॥७॥ राज्य हिरोनि बिभीषणें । भोगी सुख स्वानंदमनें । तुझें जन्म उबगवाणें[2] । झालें असे पापिष्ठा ॥८॥ मातेचें ऐकोनि वचन । पुत्र करिता झाला प्रश्न । म्हणे मातें पूर्वकथन । सांग संपूर्ण मजलागीं ॥९॥ वज्रसारा म्हणे मूळकासुरासी । पूर्वीं श्रीराम पंचवटिकेसीं । वनवासीं असतां कपटासी । शूर्पणखेनें मांडिलें ॥१०॥ पाप तिचें तीस फळलें । तिच्या कैवारें रावणें जानकीस हरिलें । रावणाचें राज्य बुडालें । श्रीरामाच्या कोपेंकरून ॥११॥ रावणकुंभकर्ण निर्दाळिले । शक्रजितादि पुत्र मारिले । राज्यीं बिभीषणा स्थापिलें । घर घेतलें श्रीरामें ॥१२॥ बिभीषणें भेद सांगितला । राक्षसांसी संहार झाला । तुझ्या मूळें आट[3] केला । लंकेचिया राज्यासी ॥१३॥ मूळाकासुरें ऐकोनि वचन । अत्यंत अनुताप झाला पूर्ण । पुढें माते उपाव कोण । कार्या कारण सांगावा ॥१४॥ माता म्हणे निजात्मजासी । तूं जाई रे वनांतरासी । प्रसन्न करोनि सदाशिवासी । राज्य मागें लंकेचें ॥१५॥ प्रसन्न करोनि चंद्रचूड । वर मागें सुदृढ । जेणें पुरे माझें कोड । महिमा वाढे तेणें तुझा ॥१६॥

**मूळकासुर तपश्चर्येसाठी निघाला :** आज्ञा लाहोनि मातेची जाण । मूळकासुर निघाला तपालागून । जेवी विनताज्ञेनें सुपर्ण । अमृतहरणा निघाला ॥१७॥ तैसा तो कुंभकर्णकुमर । सेविता झाला अटव्य[4] थोर । लंघोनि पर्वताचें शिखर । हिमाद्रीस पावला ॥१८॥ आश्रयोनि हिमवंतगिरी । तप करिता झाला जनकात्मजारी । तया अनुष्ठानाची थोरी । सविस्तरीं अवधारा ॥१९॥ निरन्न निरुदक होऊन । भूमिशयन वस्त्रविहीन । तप करिता झाला दारुण । एक सहस्र वर्षेंवरी ॥२०॥ तदनंतर जातवेदासी[5] । प्रज्वाळून घृतादिअवदानेंसीं । मग हविता झाला निजमासासी । कुंभकर्णाचा नंदन ॥२१॥

---

शब्दार्थ – १. दोष देऊन, २. व्यर्थ, ३. नाश, ४. रान, ५. अग्नीला.

घोर तपानें देव भयभीत : तप आचरोनि घोर । तृप्त केला वैश्वानर[१] । तेणें करून अंबर । दाटलेसें बहुसाल मांसगंधें ॥२२॥ खवट घाण उठिली गगनीं । तेणें तटस्थ झाले सुधापानी[१] धूम्रें व्यापिली अवनी । हाहाकार करिते झाले ॥२३॥ भयभीत झाला शचीपती । तेणें विघ्न केलें अति युक्तीं । उर्वशी पाठविली राक्षसप्रती । छळणेनें छळावया ॥२४॥ उर्वशी येवोनि आपण । कटाक्ष दावोनि बोले वचन । म्हणे तापसिया तुजलागून । तप दुर्धर म्यां केलें ॥२५॥ तुजऐसा पावावया पती । तप केलें निजात्मशक्ती । येरू म्हणे तुझे उदराप्रती । कूमर होवोनि जन्मावें ॥२६॥ ऐकोनि मूळकासुराचें वचन । उर्वशी निघाली जेथें शचीरमण । वृत्तांत तया जाणवून । स्वस्थानीं ते राहिली ॥२७॥ छळण न चले राक्षसाप्रती । देवेंद्रें जाणोनि निगुतीं । तयाउपरी कैलासपती । चतुराननेंसीं येता झाला ॥२८॥ जेथें तप करी दशग्रीवानुजकुमर । तेथें येवोनि गंगाधर । म्हणे झाले तुझें तप दुर्धर । देखोनियां तोषलों ॥२९॥

**शंकर प्रसन्न, मूळकासुराचे मागणे, त्या प्रमाणे वरदान :** माग तुज झालों प्रसन्न । जें देवा दुर्धर न देववे जाण । तें मी कृपनें देईन दान । संतोषें बाळका ॥३०॥ ऐसें वदला धूर्जटी । ऐकोनि मूळकें करसंपुटीं । विनविला म्हणे कृपादृष्टीं । मजकडे स्वामी पहावें ॥३१॥ मज अमर करावें । देवदैत्यांच्या हातें न मारावें । यक्षराक्षसगंधर्वें । तिहीं न वधावें मजलागीं ॥३२॥ पिशाच चारण असुर । मानवादि करोनि नर । आणि वनींची श्वापदें दुर्धर । तयाचेंनि मज मृत्यु न येवो ॥३३॥ ऐकोनि राक्षसाचें वचन । हांसोनियां त्रिनयन । म्हणता झाला मूळका जाण । जें बोलिलासी तें सत्य रे ॥३४॥ इतुकियांचेनि मृत्य । तुज न होईल जाण निश्चित । हें ऐकोनि राक्षसुत । सानंदचित्त पैं झाला ॥३५॥ म्हणे स्वामी दुर्धर शक्ती । द्यावी मजला युद्धार्थी । वैरी सन्मुख मजप्रती । सहसा धीर न धरिती ॥३६॥ बाळकाची ऐकोनि वचनावळी । संतोषला चंद्रमौळी । पाशुपत देवोनि ते काळीं । कर मस्तकीं ठेविला ॥३७॥ ब्रह्मा म्हणे राजकुमरा । माझें ब्रह्मास्त्र घे युद्धीं चतुरा । निवटावें रिपुसंभारा । आतां निजनगरा जाय वेगीं ॥३८॥ जे योनिद्वारें जन्मती । तयांचेनि नव्हे मृत्युप्राप्ती । हें ऐकोन राक्षस चित्तीं । सुखप्राप्ती पावला ॥३९॥ वर देवोनि राक्षसपुत्रासी । ब्रह्मा महेश कैलासासी । निघाले मागें ब्रह्मऋषी । वीणा वाजवीत पैं आला ॥४०॥

**मूळकासुराचा नारदांना मृत्युविषयी प्रश्न :** नारदाचें ऐकोनि गायन । राक्षसपुत्र करोनि नमन । म्हणता झाला माझें मरण । कोणाचेनि हातें होय मुने ॥४१॥ मुनि तुम्हां त्रैलोक्यीं गमन । जाणतां भूतभविष्यवर्तमान । सांगावें माझें कोणाचेनि मरण । विदित संपूर्ण करावें ॥४२॥ मूळकासुराचें ऐकोनि वचन । नारद हांसे खदखदोन । म्हणता झाला महेशें वर देवोन । अमर पूर्ण तुज केलें ॥४३॥ कैंचा मृत्यु राक्षस-पुत्रा । तुज काळयत्रीं भय नाहीं सर्वथा । जन्मला प्राणी अमर हे वृथा । निजश्लाघ्यता[२] भोगिती रे ॥४४॥ जननीजठरा जे आले । ते काळाचें खाजें[३] झाले । प्रळयानळाचें तोंडीं पडिले । जाण वहिलें कुमरा ॥४५॥ हिरण्यकश्यपादि थोर थोर । रावणादि रजनीचर । तेही अमरत्वाचा बडिवार । सत्य साचार मानित होते ॥४६॥ तेही गेले मरणमार्गे । काळसूत्रीं पडिले निजांगें । अमरत्व म्हणती हें वाउगें । पडले प्रसंगें जाणवेल ॥४७॥ विबुधादिक सुधापानी । दैत्य अमर समस्त मिळोनी । बैसले अमृतभोजनीं । मरणें तेथोनी मारलें ॥४८॥ सुधादान करितां राहो । त्याचे

---

शब्दार्थ - १. देव, २. आपली प्रौढी, ३. भक्ष्य.

मस्तकीं मृत्यूचा घावो । प्रथम वाजिन्त्रला पहाहो । शरीर भागद्वय झालें ॥४९॥ ऐसी मृत्यूची निजकथा । सत्य जाण घटश्रोत्रपुत्रा[1] । तुझ्या पित्यानें पूर्वी तत्वतां । तुजसारिखें पूसिलें ॥५०॥ तेंचि तूं जरी पुससी । तरी सत्य मानीं माझ्या वचनासी । जें सांगें ते भावार्थेसीं । निजमानसीं धरावें ॥५१॥ जो राज्य करोनि विदेही । देह असतां देहबुद्धि नाहीं । जया शुकादि वंदिती पाहीं । दृष्टांती कवी ज्यातें स्मरती ॥५२॥

सीतेच्या हातून मृत्यू येईल असे नारदांचे भाकीत : तया विदेहनृपाचे घरीं । जन्मली अयोनिजा कुमारी । नामें जाण सीता सुंदरी । तुझ्या पित्रारीची[2] निजभार्या ॥५३॥ तिचेनि हस्तें तुज मृत्य । राक्षसपुत्रा जाण निश्चित । ऐसें नारदमुखें भाषित । सविस्तर वृत्तांत आयकिला ॥५४॥ आज्ञा घेवोनि ब्रह्मऋषी । जातां झाला कैलासासी । मार्गे मूळक निजमानसीं । विवंचना करिता पैं झाला ॥५५॥ म्हणे नारदें काय कथिलें । असंभाव्य श्रुत केलें । न घडे ते केंवी घडे वहिलें । मिथ्या येणें बोलें दिसताहे ॥५६॥ कमळमृणालाचेनि तंतें । केंवी बांधवेल मतंगातें । केंवी कटिभंग आळिकेचेनि[3] सूत्रें । केंवी मेरू वेंघवेल ॥५७॥ धेनूचें वत्स निजशृंगेंकरीं । हिमालयाचें हृदय विदारी । मशक सागरा प्राशन करी । हें कैसेनि घडों शके ॥५८॥ महाअंधाचेनि निजपुत्रें । भेदिजे पिपीलिकेचीं नेत्रें । चरणविहीन पर्वत- । मस्तकां केवीं वळंघेल ॥५९॥ हें अघटित घडे एखादें ठायीं । परी मज मारूं न शके वैदेही । जें नादर वदला तें सर्वही । मानसीं सत्य न वाटे ॥६०॥ शुक्तिकेमाजील[4] किडा । केंवी जिंकूं शकेल गरुडा । ऐसें जाणोनि नारद वेडा । मजसीं मिथ्या बोलिला ॥६१॥ सीतेचेनि हातें मज मृत्य । हें काळत्रयीं नव्हे सत्य । जें वदला उमाकांत । ते कैसें मिथ्या होईल ॥६२॥ ऐसें मनीं भावोन । निजप्रतापें कुंभकर्णनंदन । निजनगराचें प्रांतीं येवोन । राक्षसां मात जाणविली ॥६३॥ राक्षसां म्हणे मूळकासुर । तुम्ही बिभीषणा जाणवा उत्तर । कुंभकर्णाचा निजकुमर । युद्धालागीं बोलावतो ॥६४॥ जरी सामर्थ्य असेल तुम्हांसी । तरी युद्ध करावें तयासीं । नाहीं तरी निजराज्यासी । सोडोनि वनासीं पैं जावें ॥६५॥ मार्गस्थ ऐकती त्याची वचनावळी । उपहास करोनि हांसिजे सकळीं । म्हणती हें पितयाच्या मूळीं । पूर्वी जन्म पावलें ॥६६॥ मूळींचेनि नक्षत्रें लंकेची होळी । झाली लंकानाथाची सकुळीं । आतां फिरोनि आपुलें मूळीं । नेणतां हें लागलें ॥६७॥ जेंवी वंशापासोनि[5] संभूत । तो अग्नी वना दाहो करित । वंशदाहो नव्हे शांत । तेंवी हा पुत्र राक्षसमूळीं ॥६८॥ कोणी न मानिती तयाचें वचन । सर्वही करिती उपेक्षण । जेंवी मूर्खाचें वल्गन । ज्ञाता खंडी शब्देंच एकें ॥६९॥ नवलक्ष तारा जरी । उदेल्या रवि तेज हरी । तेंवी तयाच्या वचनाची उपेक्षा करी । मार्गी जो कां भेटत ॥७०॥

बिभीषणाशी वैर न करण्याचा त्याला सल्ला : मार्गस्थ म्हणती राजकुमरा । नको प्रवर्तूं बिभीषणासीं वैरा । मंदबुद्धी सांडोनि चतुरा । आत्महिता विचारावें ॥७१॥ पुरुषें स्वहित विचारावें । बळाबळ शोधोनि पहावें । अविवेकातें सांडावें । जेणें संभवे आत्मघात ॥७२॥ ऐकोनि मार्गस्थांची वचनावळी । क्रोधें राजपुत्र खवळला बळी । म्हणे बिभीषणासहित पाताळीं । लंका पालथी करीन ॥७३॥ राक्षससेना निर्दाळीन । काळमुखीं सामावीन । सातही समुद्र लोटीन । आपुलेनि भुजबळें ॥७४॥ मेरुमांदार उलथीन । ब्रह्मगोळ पालथा करीन । देवदानवां संहारीन । ऐसा क्रोध धरियेला ॥७५॥ इतुकें भावोनि ते समयीं । जवळी

शब्दार्थ - १. मूळका, २. रामाची, ३. कोळ्याचे, ४. शिंपीतील, ५. वेळूपासून.

होते त्यां निजघातें पाहीं । मारोनि लोळविले भुई । नव्हते ऐसे केले ते ॥७६॥ दुरोनि देखोनि कंदना । उर्वरित धांवोनि बिभीषणा । वार्ता जाणविती एके बाळकें रणा । मारोनि लोकां सांडिलें ॥७७॥ वयें तरी दिसे धाकुटा । परी पराक्रम सुरेशापरीस[1] मोठा । राक्षस मारोनि नगरींच्या वाटा । राजद्वारीं उभा असे ॥७८॥

बिभीषणाला आव्हान, प्रधानांचे व मूळकासुराचे युद्ध : म्हणतसे राया जाणावा मात । मी कुंभकर्णाचा निजसुत । प्रसन्न करोनि विश्वनाथ । निजराज्य घ्यावया पैं आलों ॥७९॥ लंकाराज्य मज दीजे । नातरी मजसीं युद्ध कीजे । बहुत बोलतसे पैजे । पराक्रम आपुला ॥८०॥ नगरवासियांचें ऐकानि वचन । कोपा चढला बिभीषण । म्हणे हें कालचें बालक लहान । केवढें विंदान येणें केलें ॥८१॥ आतां त्यासीं युद्ध करूं । हाचि निर्धारींचा विचारू । ऐसें बोलोनि प्रधान वीरू । सेना सन्नद्ध करिता झाला ॥८२॥ मंत्री पाचोरोनि आणिला संपाती । जो का प्रतापें मही पालथी । करित असे तयाप्रती । निजहित सांगता झाला ॥८३॥ युद्धालागीं तुम्हीं जावें । कुंभकर्णपुत्रासी जीत धरावें । न मारोनि येथें आणावें । सभामंडपामाझारीं ॥८४॥ बिभीषणाचें ऐकोनि वचन । युद्धालागीं निघाले प्रधान । सन्नद्ध करोनियां सैन्य । घाव निशाणीं घातला ॥८५॥ लागली वाजंत्रांची ध्वनी । दिग्गजां टाळी बैसली कर्णी । आंदोळली भौमाची[2]जननी[2] । दशदिशा दाटल्या ॥८६॥ कुंजर निघाले अगणित । जैसे चौं चरणांचे पर्वत । असिवार अपरिमित । सेनावेष्टित चालिले ॥८७॥ हरंवरांचेनि घडघडाटें । पृथ्वीचें हृदय फुटे । थरारिलें कूर्मपृष्ठ । शेषें माथा डोलविला ॥८८॥ पायदळाची गणना करितां । मोजूं न शके विधाता । विरंचिअंड[3]पालथा । घालितील सुभटपणें ॥८९॥ पताका मंडिता रामनामेंकरीं । देखोनि शनीचा अग्रज पळे दुरी । शरणागताची[4] सेना ऐसिये परी । पूर्वद्वारें निघाली ॥९०॥ रामनामे गर्जती वीर । जैसे वर्षाकाळींचे मयूर । मूळकें देखोनि वामनोद्गार । अग्निज्वाळा मुखीं सांडी ॥९१॥ नेत्र करोनि आरक्त । क्रोधें थरथरां कांपत । हृदयीं भडका सुटत । दंतें चावित अधरोष्ठ ॥९२॥ देखोनि लंकेशयैन्यातें । गर्जना केली वज्रसारासुतें । म्हणे हीं वृथा मरणातें । कां बापुडीं येथें आलीं ॥९३॥ मृत्यु समीप तैं पिपीलिकाकुळा । पक्ष फुटती दाविती बळा । तैसे रजनीचर मजजवळा । युद्धा उतावेळ घालिती झडा ॥९४॥ आतां या सैन्या युद्धप्रसंगें । लावीन यमपुरीचें मार्गे । ऐसें बोलोनि शरयोगें । कार्मुक योजिता जाहला ॥९५॥ धनुष्य टणत्कारिलें ते वेळा । बाण घेतला तेजाळा । बीजाक्षरें जपोनि आदरिला । वरी टाकिला ते समयीं ॥९६॥ तया बाणाचेनि घोषें । भ्रमित झालीं दिग्गजांचीं मानसें । प्रळय सुटला रविशशी आकाशें । सांडोनि दशा लंघिती ॥९७॥ तो बाण आला अरिदळावरी । पडतेक्षणीं संपाती सांवरी । निजशरें तोडोनि वरचे वरी । सेनेपरता सांडिला ॥९८॥ अचतुराचें जैसें वचन । पंडित विवेकें करी खंडन । तैसा मूळकासुराचा बाण । निजशरें छेदिला ॥९९॥ संपाती प्रधानांमाजी बळी । संधान आरंभिलें ते काळीं । शर सोडिला मंत्रावळी। जपोनि रामनामाच्या ॥१००॥ रामनामें मंडित शर । सुटले गर्जत घोषवित अंबर । देखोनि मूळकें सत्वर । शिववरद बाण सोडिला ॥१॥ परस्परे बाणां पडली मिठी । जैसे व्याळ व्याळकंठीं । झगटोनि एकएकांचे पोटीं । सामावोनि पैं गेले ॥२॥ उपरी मूळकें अधिक दाविलें । एके बाणें त्रैलोक्य व्यापिलें । शरमय गगन झालें । रवि कोपला ते काळीं ॥३॥ सायंकाळ प्रवर्तला । पक्षियांसि प्रळय झाला । पशु परतले दीप लागला । गृहीं गृहीं राक्षसांचे ॥४॥

---

शब्दार्थ – १. इंद्रापेक्षा, २. पृथ्वी, ३. ब्रह्मांड, ४. बिभीषणाची.

प्रधानांचा पराभव : माव केली मूळकें ते समयीं । प्रधानादिक राक्षस ठायींचे ठायीं । बांधोनि वस्त्राभरणें पाहीं । हिरोनि नग्न पैं केलें ॥५॥ तयावरी काय केलें । राक्षसां एकवट बांधिलें । मग बिभीषणाकडे पाठविलें । मार्गस्थांस ते काळीं ॥६॥ राया जाणविला वृत्तांत । कित्येक सैन्या केला अंत । प्रधानादि कित्येक जीवंत । धरोनियां राखिलें ॥७॥ वार्तिकें[1] सांगती वार्ता । अहो जी ऐका लंकानाथा । मूळकासुरें प्रधानादि समस्तां । रणीं व्यथाभूत केले पैं ॥८॥ वार्तिकांची ऐकोनि वचनावळी । क्रोधें बिभीषण ते काळीं । किंचित उर्वरित राक्षसबळी । त्यांसमवेत युद्धा निघाला ॥९॥ मार्गीं झाले अपशकुन । डावें वायस करिती गमन । दक्षिणें भारद्वाज हरिण । चाष मयूरें पैं गेलीं ॥११०॥ पुढें घायाळ भेटले । तिहीं राया जाणविलें । सैनिक बांधोनि राखिले । नावानिगे[2] प्रधान ॥११॥

युद्धासाठी बिभीषणाचे आगमन : ऐकोनियां तयांची मात । बिभीषण श्रीरामनामे गर्जत । निर्भय होवोनि निजदळासहित । रणभूमीस पैं आले ॥१२॥ रामनामें करोनि भुभुःकार । नामें गर्जत चालिले वीर । मोहनी पळोनि सत्वर । नामासमोर न राहे ॥१३॥ एकच एक श्रीरामनाम । सकळ पातकां करी भस्म । नामें तुटे भवबंधश्रम । तैसे बांधिले वीर सुटले ॥१४॥ सोडवोनि निजप्रधानां । पुढें आरंभिलें रणा । बिभीषणें सोडोनि अमित बाणां । पृथ्वी गगना व्यापिलें ॥१५॥ मूळकासुरें देखोनि पितृव्यशर । तयांवरी सोडी काळदंडाहूनि कठोर । जो लागतां भेदी जिव्हार । हिमालय पर्वताचें ॥१६॥ तो शर येतां गगनीं । लंकेशबाणां झाली खंडणी । मग तो राक्षस गर्जोनी । बिभीषणासी बोलिला ॥१७॥ अगा ये बिभीषणा ख्याति थोर । राक्षसकुलीं केली अपार । झालासी श्रीरामाचा किंकर । मर्कटेसीं सख्य करोनि ॥१८॥ शाखांमृग[3] जे पर्णभक्षक । ते रामाचे दळीं मुख्य नायक । तयांमाजी तूंही रंक । प्रधानत्व मिरविसी ॥१९॥ तुज आणि त्या रामातें । पाठवीन यमपुरीतें । तरीच वज्रसारेख्या हृदयातें । जन्मलों मी हें जाण पां ॥१२०॥ जरी पुत्र होईन कुंभकर्णाचा । तरी सूड घेईन पितृव्याचा । नाहीं तरी पाषाण मी साचा । तुजसारिखा जन्मलों ॥२१॥ ऐसें बोलोनि पंच बाण । सोडिले अति दिव्य दारुण । ते बिभीषणें वरचेवरी खंडून । भूमीवरी पाडिले ॥२२॥ विवेकसंपन्न वैरागी । पंचविषयां दमवी निजांगीं । तैसे बिभीषणें शर मार्गीं । कूट करोनि पाडिले ॥२३॥ बिभीषणाची संधानठेव । देखोनि मूळकें बाण नव । सोडिले ज्याचें भय अपूर्व । अवनी नवखंड होऊं पाहे ॥२४॥ नवबाण येतां लंकेशावरी । ते नव शर ते अवसरीं । खंडोनि पाडिले पृथ्वीवरी । नव गिरींचीं शिखरें जैसीं ॥२५॥ तदनंतरें कुंभकर्णसुतें । कार्मुकीं योजिलें एकादश बाणातें । पुंखापासोनि[4] शर गगनातें । पक्षियांऐसे सूटले ॥२६॥ ते एकादश नव्हती शर । केवळ ईश्वराचे अवतार । पृथ्वी व्यापोनि अंबर । दशदिशा प्रकटले ॥२७॥ करीं त्रिशूळ डमर । पिंगट जटा भयंकर । रुंडमाळा भस्मधर । ऐसीं रूपें प्रकटलीं ॥२८॥ आश्चर्य देखोनि गदापाणी । भस्मासुर आव्हानिला बाणीं । देखोनि रूद्ररूपें तत्क्षणीं । नेणां कोणीकडे गेलीं ॥२९॥ रुद्रावेशें मूळकासुरें । कोपानियां अति गजरें । कार्मुक घेवोनियां ईश्वरें । दिधलें ते बाण सोडिले ॥१३०॥ ते येतां द्वादश शर । देखोनि स्वर्गी भयातुर । इंद्रादि देव म्हणती घोर । कर्म येणें आरंभिलें ॥३१॥ या द्वादश शरांच्या घायीं । द्वादश सूर्य पडती ठायीं । बापडें बिभीषण निवारील कायी । शिवाचे हे वरद बाण ॥३२॥ बिभीषण गदेनें खंडन करी । तंव अकस्मात पडिले वरी । सहा बाणीं रथा चकचुरीं ।

शब्दार्थ – १. हेर, २. नामांकित, ३. वानर, ४. बाणाच्या पिसाऱ्यापासून.

चारी आंखा[1] लागले ॥३३॥

बिभीषणाचा हृदयभेद : उर्वरित दोनी शर । ते बिभीषणाचें जिव्हार । भेदोनि पलीकडे सत्वर । पाताळभुवनीं प्रवेशले ॥३४॥ बिभीषणाचें हृदय भेदोनि । निश्चेष्टित रणमेदिनीं । पडला पादप जैसा वायूंनी । उलंडला शाखेसहित[2] ॥३५॥ घटिका द्वादशपर्यंत । रणीं बिभीषण मूर्च्छित । ऐसे देखोनि कुंभकर्णसुत । नगरामाजी प्रवेशला ॥३६॥ बोलावोनि सेना सैनिक । आपणासि केला पट्टाभिषेक । मस्तकीं छत्रशशांक । राज्य धरू बैसला ॥३७॥ मूळकें मातेपासीं येऊन । साष्टांगेंसीं केलें नमन । जोडिले हस्तीं संपूर्ण । सर्व वृत्तांत जाणविला ॥३८॥ एका जनार्दना शरण । झालें मूळकासुर कथन । पुढिलें प्रसंगीं बिभीषण । श्रीरामा शरण जाईल ॥३९॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां बिभीषण-पराभवमूळकासुरलंकाराज्यपटप्राप्तिर्नाम एकसत्पतितमोऽध्याय: ॥७१॥ ओंव्या ॥१३९॥

## अध्याय बाहत्तरावा

॥ श्रीसांबसदाशिवाय नमः ॥

### मूळकासुराचा वध

श्रीरामभेटीला बिभीषण निघाला, अयोध्येचे वर्णन : रणीं बिभीषण पडिला । तो प्रधानें सावध केला । जैसा नदीस बुडतां काढिला । थडीचिया जनीं हो ॥१॥ रावणानुज होवोनि सावधान । प्रधानांप्रति बोले वचन । आतां कर्तव्य काय आपण । इये समयीं करावें ॥२॥ प्रधान म्हणती राजाधिराजा । शरण जावें श्रीरघुराजा । सिंहाचे प्रसादें अजा । गजमस्तकीं आरूढली ॥३॥ गदापाणि म्हणे धन्य जिणें । आजि राघवासि भेटणें । हाचि निश्चय करोनी मनें । प्रधानांसीं निघाला ॥४॥ चवघांचियां समवेत । बिभीषण मार्गीं जात ; म्हणे आजि भेटेल गरुड-ध्वज । क्षेम देईल उचलोनि भुज । सांगेन जीवींचें निजगुज । अधोक्षज[3] देखिलिया ॥६॥ नेत्रां होईल पारणें । धणीवरी सुख घेईन मनें । पूर्णिमा देखोनि चकोर वदनें । चंद्राकारणें पसरिती जैसें ॥७॥ ऐसा मार्ग क्रमित मेदिनीं । उल्लास न माये अंत:करणीं । तंव पुढें देखिली राजधानी । रघूमत्तरायाची ॥८॥ सुवर्णकळश रत्नजडित । पताका अंबरीं रामनामांकित । काळ धाकें न राहे तेथ । पुरी साकेत शोभे ऐसी ॥९॥ अयोध्यानगरींचे जन । करिती श्रीरामकीर्तन । घरोघरीं वेदाध्ययन । पुराण व्याख्यान ठायीं ठायीं ॥१०॥ जनीं अयोध्येसीं वसतां । नेणती जन्ममरणवार्ता । नाहीं दरिद्राची कथा । नित्य स्मरतां रामनाम ॥११॥ शरयूतीर अति पावन । सेवितां राहिले मुनिजन । पायवाट स्वर्गा गमन । करावयालागूनी ॥१२॥ अयोध्येचें स्मरणमात्रें । मोक्ष वोळंगे[4] पाणियातें । इतर इजसमान नव्हेत तीर्थे । काशीआदि करोनी ॥१३॥ काशी हृदयीं परम कृपण । मरणांतीं मुक्ति दे दान । अयोध्या ईहूनि उदार गहन । स्मरणें पावन मोक्ष दे ॥१४॥ यालागीं वाल्मीकादि कवीश्वरीं । वर्णिली अयोध्या प्रथम पुरी । मोक्षदानी अति उदारी । निजथोरी जियेची ॥१५॥

श्रीरामांची भेट व त्यांना निवेदन : ऐसिये अयोध्येमाजी रघुनाथ । राज्य करी बंधूसमवेत । तेथें बिभीषण शरणागत । राजसदना उजू आला ॥१६॥ भद्रासनीं रविवंशभूषण । दक्षिणे वसिष्ठ ब्रह्म पूर्ण । परिवेष्टित बंधू आदि लक्ष्मण । सेवे सावधान तिष्ठती ॥१७॥ दुरोनी

शब्दार्थ - १. रथाचे कण्यांना, २. फांदीसह, ३. श्रीविष्णू, ४. पायी लागे.

देखिला श्रीरघुनाथ । बिभीषणें घातला दंडवत । जोडले करीं प्राणिपात । श्रीरामासि पैं केला ॥१८॥ श्रीरामें उठोनि ते समयीं । शरणागता धरोनि हृदयीं । आलिंगिला दोहीं बाहीं । जेंवी माता बाळका ॥१९॥ बैसकेस दे रत्नजडित पाट । देवोनि बैसाविला निकट । म्हणे शरणागता बहुत कष्ट । झालें ऐसें दिसततसे ॥२०॥ चंद्राच्या तुटती जेंवीं कळा । तेंवी तुझे देखोनि मुखकमळा । वोहट पडिला हर्षकळा । आनंदजिव्हाळा न देखों ॥२१॥ जीवनेंवीण वल्ली । सुकोन शुष्क जाहली । तैसी हृदयींची काजळी । दिसततसे मुखावरी ॥२२॥ कोण हृदयींची चिंता । ते मज निवेदी पौलस्तिसुता । श्रीरामाची देखोनि आदरता । सुख झालें बिभीषणा ॥२३॥ पौलस्ति म्हणे कमलोद्भवजनका । स्वर्गगमनपुरीच्या नायका । दिनमणिकुळदीपका । अपूर्व एक देखिलें ॥२४॥ वारीमृणालाचा[1] तंतु । त्यामाजि गुंतला ऐरावतु । मशकें भूगोळ मुखांतु । दंतदाढा रगडिला ॥२५॥ मर्कटें समुद्र शोषिला । मृगजळीं वंध्यापुत्र बुडाला । जंबुकें सिंह विदारिला । सशानें भेडसाविला शार्दूळ ॥२६॥ छायेनें पुरुष गिळोन । उरगें[2] गरुडावरी केलें आरोहण । पिपीलिकेचा जो नंदन । तेणें मेरु उपटिला ॥२७॥ ऐसें वर्तलें नृपचूडामणी । जंबुकें सिंहाचा कवळ नेला हिरोनी । ऐसें झालें मजलागूनी । देवाधिदेवा विधिजनका ॥२८॥ ऐसियासि ऐका वृत्तांत । कुंभकर्णाचा जो मूळक सुत । तेणें प्रसन्न करोनी उमाकांत । अद्भुत वर पावला ॥२९॥ वरदबळेंकरून । युद्ध केले अति दारुण । समस्त मारोनी राक्षससैन्य । माझें राज्य हरितलें ॥३०॥ श्रीराम म्हणे गा गदापाणी । केली रावणकुळा खंडणी । पुत्रासहित रणीं । निद्राप्रिय मारिला ॥३१॥ हा तैं काय नव्हता । किंवा अन्यत्र स्थळीं गेला होता । याची सांगे समूळ कथा । जे ऐकतां सुख होय ॥३२॥

**रामांना मुळकासुराची कथा निवेदिली :** ऐसें बोलिलें नलिनीदळनेत्रें । तें परिसोनि बिभीषणें पवित्रें । सांगों आदरिलें चरित्र । निजाग्रजसुताचें ॥३३॥ गदापाणि म्हणे कनकमृगारी । याचे मातेचिया उदरीं । पूर्वी पुत्रद्वय जन्मलें सुरारीं- । माजी[3] रणपंडित ॥३४॥ कुंभ निकुंभ नामें प्रसिद्ध । काळावरी जयांचे बिरुद । तयांमागें मतिमंद । पित्याचे मूळीं लागला ॥३५॥ जन्मता सांडिला बाहेरी । निशा राक्षसीनें वाढविला घरीं । याचे मुळें सर्वां बोहरी । देवाधिदेवें श्रीरामें केली ॥३६॥ सर्व कुळाचा झाला नाश । कुंभकर्णस्त्रियेनें नगरास । आणोनि वाढविला कोणास । कळों नाहीं दिधलें ॥३७॥ जेंवी पुरिला अग्निहोत्रींचा वन्ही । प्रकट परी न देखे कोणी । ऐसा वाढला लंकाभुवनीं । पुढें तपा निघाला ॥३८॥ प्रसन्न करोनि चंद्रमौळी । वर मागितला तये वेळीं । अमर करीं भूमंडळीं । देवीं दैत्यीं न मारावें ॥३९॥ मानवादि गंधर्व विद्याधर । किंपुरुष चारण असुर । पक्षी श्वापदें जीव क्रूर । मज वधीं तत्पर न व्हावें ॥४०॥ होय म्हणोनि अंधकरिपु । म्हणे मनींचा सिद्ध संकल्पु । या इतुकियांचें हातें वपु । मरण न पवे संग्रामीं ॥४१॥ मग उपदेशून मंत्रावळी । कैलासा गेला इंदुमौळी । मागें मूळकासुरें भूमंडळीं । आम्हां दुःख दीधलें ॥४२॥ शरणागत ऐसें बोलिल्यावरी । स्वामीची मनोदेवता आश्चर्य करी । क्षण एक निवांत दूषणारी । निजासनीं बैसला ॥४३॥

**त्याच्या मरणाचा उपाय वसिष्ठांनी सांगितला :** क्षणैक ध्यानस्थ गौतमश्वशुर । मग बोलता झाला उत्तर । याचे वधाचा प्रकार । समस्तां प्रति पुसतसे ॥४४॥ तंव वसिष्ठ म्हणे श्रीरघुनाथा । यासी वधील जनकदुहिता । नारदें मज सांगितलें ॥४५॥ याची ऐसी मरणाची कथा । सद्गुरुमुखींचें ऐसें वचन । श्रीरामचंद्रें परिसोन । प्रधान पाचारिले सज्ञान । सुमंतादि थोर

शब्दार्थ - १. कमळाचा, २. सर्पानें, ३. दैत्यांत.

थोर ॥४६॥ आज्ञा केली श्रीरघुवीरें । सुग्रीवादि येवोनि वानरें । सेना सज्जोनि वाद्यें तुरें । नानापरींचीं वाजित्रलीं ॥४७॥ जानकीस पुरुषवेष दिधला । अलंकारभूषणीं मिरविला । तंव बिभीषण बोलता झाला । पारणें कीजे राजेंद्रा ॥४८॥ आजि कार्तिकद्वादशी । पारणें सारोनि प्रयाणासी । मग करावें लंकेसीं । राक्षसवधाकारणें ॥४९॥ तंव बोलिला श्रीरघुनंदन । आणीं मूळकासुर मारून । मग करूं भोजन । हे प्रतिज्ञा निश्चित ॥५०॥ तुज राज्य दिधल्यावीण शरणागता । आम्हां भोजनीं नाहीं अर्हता[1] । ऐसें वदोनि श्रीरघुनाथा । स्फुरणें बाहु वाढत ॥५१॥

सीता पुरुषवेषाने निघाली : पुरुषवेष सालंकारीं । शृंगारिली जानकी सुंदरी । निजधनुष्य घेवोनि करीं । अश्वावरी बैसविली ॥५२॥ प्रधान सेना सैनिक । परिवेष्टित कपिकटक । मध्ये शोभे रघुनायक । जानकी सम्यक पृष्ठभागीं ॥५३॥ मग श्रीरामें काय केलें । पुष्पकासि पाचारिलें। त्यावरी बैसोनि सहदळें । लंकापुर पावले ॥५४॥ ऐसें चालतां निजभारीं । पंचघटिका भरता पुरीं । प्रवेशला जैसे पुष्पावरी । षट्पद[2] बहुसाल ॥५५॥ तडागाचे निकट पाळीं[3] । पक्षी जैसे पावती सकुळीं । तैसा निजसैन्येंसीं आतुर्बळी । लंकाप्रदेशीं पावला ॥५६॥ देखोनियां निजलंका। लतामृग[4] चढले तवका । शिळा पाषाण तरु अनेका । करी घेवोनि चालिले ॥५७॥ त्रिकूट वेढिला वानरीं । देखोनियां सुरारी । आश्चर्य करी ते अवसरीं । दडोनि राहिला निजगृहीं ॥५८॥

मूळकासुराला अपशकुन, युद्धाला प्रारंभ : वार्ता ऐकोनि मूळकासुर । किंचित सेना सज्जोनि सत्वर । पश्चिमद्वारें चालिला थोर । अपशकुन पैं झाले ॥५९॥ निजरथाच्या ध्वजावरी । वायस येवोनि शब्द करी । पुढें एक द्विज मोकळे शिरीं । मार्गीं येतां देखिला ॥६०॥ अशुद्धाचा शिरवा[5] पडे । रथींचा वारू चालतां अडे । आंख मोडोनि दुखंडें । धुरेचीं पैं होती ॥६१॥ सारथि उलंडला धरणीं । मूळकासुरें उडी टाकोनी । दुसरे रथीं आरूढोनी । संग्रामासी निघाला ॥६२॥ अपशकुनें भयभीत सैन्य । तयासि अभय देवोन । करिता झाला तुंबळ रण । वांनरेसीं भिडोनियां ॥६३॥ वानर टाकितें झाले शिळा । राक्षस तोडिती शरजाळा । अद्‌भुत संग्राम मांडला । वीरें वीर पडखळिले ॥६४॥ तंव हनुमंतें रुद्रावेशें । सोडिलीं पर्वताचीं शिसें । देखोनि तोडिलीं रजनीचरेशें । उपरी काय आरंभिलें ॥६५॥ ईशानदत्त[6] वरद बाण । कार्मुकीं योजिले मंत्र जपून । ते वानरसेनेवरी येतां रघुनंदन । देखोनि धनुष्य घेतलें ॥६६॥ कार्मुकीं बाण रघुराजें । योजिला जपोनि मंत्रबीजें । जयाचेनि निजदिव्यतेजें । दशदिशांमाजि बिंबती ॥६७॥ ऐसे श्रीरामाचे शर । यमदंडकाहूनि कठोर । सुटले तेणें अंबर । व्यापिलें दिसे ते समयीं ॥६८॥ बाणें बाणा निवारिलें । आकाश निर्मळ जाहलें । वर्षाकाळ गेलिया आगमन केलें । शरदृतूनें पैं जैसें ॥६९॥ देखोनि श्रीराघवाचें संधान । राक्षसें आश्चर्य मानोन । काय बोलता झाला वचन । बिभीषणासी परियेसा ॥७०॥ अगा ये पूर्वजा बिभीषणा । तुवां साह्य आणिलें श्रीरघुनंदना । तरी मज त्याची नाहीं गणना । शिवप्रसादेंकरोनि ॥७१॥ माझा मृत्यु यांचेनि हस्ते । नाहीं जाण तूं निभ्रांतें । साटोप धरोनि युद्धातें । वृथा मरावया आलेती ॥७२॥ पूर्वीं श्रीरामें कपट केलें । छळोनि वालीसी वधिलें । ते मत येथें कांहीं न चाले । मज मूळकासमोर ॥७३॥ ऐसे राक्षसाचे वचनीं । श्रीरघुराजें विचारोनि मनीं । धनुष्यीं बाण

---

शब्दार्थ – १. योग्यता, मोठेपणा, २. भ्रमर, तीरीं, ४. वानर, ५. सडा, ६. शंकराने दिलेला.

लावोनी । पुढारला पैं होय ॥७४॥ मूळकासुरा हटकोन । श्रीराम करिता झाला संधान । मागें जानकी सरसावोन । पाठीसीं उभी राहिली ॥७५॥

सीतेची शंकरांना प्रार्थना : श्रीराम मूळकासुर परस्परें । युद्धीं भिडती आवेशें थोरें । मागोनी जानकीनें त्वरें । धनुष्या हात घातला ॥७६॥ शितीं लावोनि श्रीरामदत्त बाण । वोढी काढोनि आकर्ण । मनीं स्मरोनि श्रीरामचरण । काय आठविती पैं झाली ॥७७॥ म्हणो अहो जी सदाशिवा । म्यां जरी एकाग्रचित्तें सेवा । करोनि भजलें असेन राघवां । तरी हा बाण मूळका वधों ॥७८॥ माझा पिता विदेही जनक । राज्यराष्ट्रपाळक । सत्य असेल तरी हा अचुक । राक्षसा बाण भेदील ॥७९॥ श्रीराम एकपत्नीव्रतधारी । हें सत्य असेल जरी । तरी त्या माझ्या निजशरीं । कुंभकर्णपुत्र मरेल ॥८०॥ अनसूया जे पतिव्रता । तिणें मज अनुग्रहिलें वनीं वसतां । तियेचें प्रसादें राक्षससुता । मरण होवो या शरें ॥८१॥ वसिष्ठ सद्‌गुरु ब्रह्म पूर्ण । जरी एकबुद्धीं केलें असेल भजन । लक्ष्मण शेषावतार सत्य जाण । तरी येणें बाणें मरण राक्षस पावो ॥८२॥ ऐसें भावोनियां[1] मानसीं । शर सोडिला घोर्षी आकाशीं । प्रळय झाला दिग्गजांसी । चंद्रसूर्यें भूमि सेविली ॥८३॥ नक्षत्रें खचलीं पृथ्वीवरी । पर्वत उलंडले सागरीं । मर्यादा सांडूं पाहती भारी । संकट येवोनि पडिलें वीरां ॥८४॥ वानरदळीं केला गजर । राक्षससैन्यीं हाहाकार । नभोमार्गें शर । मूळकासुरावर येवों सरला ॥८५॥

मूळकासुराचा वध : राक्षसपुत्र करी निवारण । तंव अकस्मात येवोनि बाण । शिर छेदोनि रणीं जाण । सीतेच्या भातां रिघाला ॥८६॥ मूळकासुर पडिला रणीं । जेंवी पर्वत खचे मेदिनीं । उरले सैन्य वानरगणीं । शिळावारीं कूट केलें ॥८७॥ जेंवी तडागीं[2] तुंबळ । फुटतां पसरे चहूंकडे जळ । तेंवी कुंभकर्णपुत्राचें दळ । दशदिशा लंघितें झालें ॥८८॥ जानकीचेनि हस्तें जाण । मूळकासुर पावला मरण । ऐसें देखोनि सुरगण । पुष्पवर्षाव करिता झाला ॥८९॥ विजयी झाला श्रीरघुनाथ । विजयी कपि आनंदभरित । विजयी बिभीषण शरणागत । निजराज्यीं स्थापिला ॥९०॥ याउपरी पुष्पकविमानीं । बैसोनि जानसकीसह कोदंडपाणी । बंधुवर्गेंसीं अयोध्याभवनीं । प्रवेशता पैं झाला ॥९१॥ वानरां आज्ञा देऊन । निजस्थाना पाठविलें जाण । यापरी वर्तलें तें सावधान । श्रोतृजन परिसोत ॥९२॥ म्हणाल हें मूळीचें नव्हे निरूपण । वाल्मीकें कथिलें जाण । तरी हे कथा अप्रमाण । ऐसें संतीं न म्हणावें ॥९३॥ वाल्मीकें शतकोटि केलें । तें एक महेशें पाहिलें । भागत्रय करोनि वाटिलें । हे प्रसिद्ध जाणतां ॥९४॥ मृत्युलोकीं जो भाग । तो युगानुयुगीं झाला भंग । काही एक उर्वरित कथाभाग । लोकोद्धारणा राहिला ॥९५॥ याकारणें वाल्मीक ऋषी । वदला नाहीं कथा ऐसी । म्हणतां कुष्ठ लागे वाचेसीं । ऐसें पंडित जाणती ॥९६॥ अबद्ध सुबद्ध रामायण । श्रीरामाचें चरित्र गहन । श्रवणें भवदोषखंडन । सादरें जरी ऐकिजे ॥९७॥ पक्षियाचे उच्चारें गणिका । विमानीं बैसोनि वैकुंठलोका । गेली हा तुम्हांसि ठाऊका । नाममहिमा रामाचा ॥९८॥ श्रीरामकथासागर । याचा कोणा कळेल पार । भोक्ता एक श्रीशंकर । जेणें शतकोटि विभागिलें ॥९९॥ एका जनार्दना शरण । जानकीसहित श्रीरघुनंदन । अयोध्येसी सुखसंपन्न । येवोनि राज्यभार चालवीत ॥१००॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां मूळकासुरवधो नाम द्विसप्ततितमोऽध्यायः ॥७२॥ ओंव्या ॥१००॥

शब्दार्थ - १.कल्पून, २. सरोवरामध्ये.

# अध्याय त्र्याहत्तरावा

॥ श्रीसीतावल्लभाय नमः ॥

## सीतेचे पाताळात गमन

वानरसेनेसीं श्रीरघुनाथ । विजयी झाला आनंदभरित । अयोध्ये येवोनि कार्यार्थ । पुढें काय वर्तला ॥१॥ मारोनियां कुंभकर्णपुत्र । विजयी झाला श्रीराम जानकीसहित । ऐसें ऐकोनि महंत । थोर थोर येते झाले ॥२॥ आले विबुध सुधापानी । आला अगस्ति ज्याची जननी । उर्वशी नामें प्रसिद्ध ॥३॥ ऐसिये शरयूतीरपुराभीतरी । सभासदनीं पौलस्त्यारी[1]। बंधुपुत्रवेष्टित ऋषीश्वरीं । बैसिजेल निजस्थानीं ॥४॥ कौसल्यादि माता जाण । पूरवासी नागरिक प्रधान । श्रीगुरु वसिष्ठ पावन । यांहीं विराजमान शोभत ॥५॥ जेंवी इंदुमंडळा पुढें मागें । परिवेष्टित तारागणें अनेगें । तैसें समस्तांसहित श्रीरंगें । सभासदनीं शोभिजे ॥६॥ जेंवी मानससरोवरीं । पक्षिये मुक्ताफळाहारी[2]। जेंवी सुधापानियांमाजी शैलारी । तैसा राजेश्वरीं शोभे श्रीराम ॥७॥ कुळाचळामध्ये हिमगिरी । कीं समुद्रामध्यें पयोधारी । समस्त धातूंच्या शिरीं । शोभे सुवर्ण पैं जैसें ॥८॥ कीं श्वापदांमाजी शार्दूळ । कीं लतामृगांमाजी अंजनीबाळ । कीं अवतारांमध्यें विशाळ । त्रिविक्रम पैं जैसा ॥९॥ कीं तापसियांमाजी धूर्जटी । कीं ऋषींमाजी तपे ज्याची काठी । कीं जापकांमाजी दुजा सृष्टी । कर्ता विश्वामित्र ॥१०॥ कीं मुनींमाजी नारद । कीं पांडवांमाजी धर्म अगाध । कीं मुक्तींमाजी सायुज्यपद । तैसा अगाध शोभे श्रीराम ॥११॥ ऐसिये सभामंडळीं । मध्यें कैकेयी बोलली ते काळीं । तें अवधारावें सकळीं । आश्चर्य एक वाटतसे ॥१२॥ जानकीचें रूप यौवनें । भुलली कनकाची हरिणें । राज्य त्यागून रावणें । भिक्षुक होवोनि हरूं आला ॥१३॥ एवढे इचें सौंदर्य साजिरें । पक्षी भुलले कंठाक्षरें । ती जानकी वल्कांबरें । वेढोनि अशोकीं कैसी होती ॥१४॥ परिवेष्टित विशाळ क्रूरें । रक्षणें ठेविलीं दशकंधरें । तेथें इणें निजसामर्थ्यद्वारें । निजसत्व राखिलें कैसें ॥१५॥ जे तारुण्यें मुसमुसी वनिता । परदेशीं दृष्टसंगें असतां । तिचा पतिव्रताधर्म राहता । हें थोर आश्चर्य होतसे ॥१६॥

**कैकेयीच्या वचनानें जानकी दुःखित :** ऐसें कैकेयीचें कुरसवचन । ऐकोनियां समस्त जन । विस्मय पावोनि अधोवदन । जानकी पैं बैसली ॥१७॥ सापत्न सासूचे वाग्बाणीं । हृदयीं खोंचली जनकनंदिनी । जेवीं अनिळें कर्पूरजननी[1]। थरारूं लागे निजांगें ॥१८॥ जेंवी कुवायूचेनि प्रसंगें । समुद्रीं नौका बुडूं लागे । नातरी दुर्जनवचनें भंगे । चित्तवृत्ती साधूंची ॥१९॥ हरिकथेचा मांडिला रंग । तेथें कुवार्ता येतां रसभंग । तैसें कैकेयीवाग्बाणें जग । जानकीसहित भेदिलें ॥२०॥ कीं तापसियावरी कामबाण । कीं पंडितांपुढें दुर्जन । तैसे कैकेयीशब्दें जन । जानकीसहित दुखावले ॥२१॥ उरगमाथां काटा नेहटे । कीं पालीचें पुच्छ तुटे । कीं पतिवियोगें फुटे । वनितेचें हृदय जैसें ॥२२॥ यापरीच ती राजबाळा । अधोवदन निस्तेजमुखकमळा । वहोट पडला सुखकल्लोळा । अमांतीं[3] चंद्र जैसा ॥२३॥ सरोवरीं शोषलिया जीवन । कमळिणी जाय सुकोन । तैसें जानकीचें हृदय गहन । चिंतासर्पिणीनें चाटिलें ॥२४॥

शब्दार्थ – १.रावणारी (रामचंद्र), २. मोत्यें खाणारे, ३. अमावास्या संपून.

म्हणे आतां काय करणे । किती वेळा दिव्य देणें । मी जरी शुद्ध अंत:करणें । तरी या लोकां विपरीत वाटतसे ॥२५॥ सत्यवादी पहा जन । सोपहास मिथ्या वदोन । असंभाव्य देवोनिं मान । सत्य भाषण म्हणती त्याते ॥२६॥ तैसिया लोकांची वर्तती स्थिती । त्यासी निंदणें हेचि अयुक्ती । आपलें प्रारब्ध भोगती । अवश्यभावें भोगावें ॥२७॥ प्रारब्धें दमयंतीनळां । प्रारब्धें हरिश्चंद्रभूपाळा । प्रारब्धें पांडुपुत्रां सकळां । विवरद्वारें पैं नेलें ॥२८॥ बंधु जियेचा श्रीहरी । ऐसी ते द्रौपदी सुंदरी । वस्त्रें हरोनि दुराचारी । सभेमाजी नग्न करिते झाले ॥२९॥ तरी आतां प्रारब्ध प्रमाण । अवश्य भोगणें पडिलें जाण । कैकेयी बापुडें तें कोण । मजसी कठिण बोलावया ॥३०॥ ऐसें विचारोनि सीता देवी । मनातें विवेकमार्गीं लावी । पुढील कथा ते परिसावी । चतुर पंडितादिकीं ॥३१॥

जानकीची पृथ्वीला प्रार्थना : जानकी म्हणे अवो धरणी माय । पुढें म्यां आतां काय करावें । तुवां मज हावोनि साह्य । ठा . द्यावा निजहृदयीं ॥३२॥ जन्मलें मी तुझ्या उदरीं । वाढलें विदेहाचे घरीं । नांदलें निजभाग्येकरीं । श्रीरामाची सेवा करून ॥३३॥ काया वाचा निजमानसें जाण । आराधिला असेल श्रीरघुनंदन । तरी मज देई वस्तीसी स्थान । आपुलिये हृदयकमळीं ॥३४॥ पूर्वीं म्यां लंकेच्या प्रदेशीं । दिव्य दिधलें देखतां जगासी । तैं मिळाले होते महाऋषी । आणि इंद्रादि देवगण ॥३५॥ ब्रह्मा शिव आणि सुधापानी । आणि मिळाली होती कपिवाहिनी । या समस्तां देखतां प्रवेशोनि अग्नीं । दिव्य दिधलें श्रीरामा ॥३६॥ तरी आंता तेचि असती समस्त । तयांसी कळेल माझें मनोगत । परी न सोडी प्रारब्ध बळवंत । टाकोनियां पुढें आलें ॥३७॥ जैसा दरिद्री आयास करी । उदीम न करी श्रमचि उरी । तैसी मी निष्पाप जरी । तरी प्रारब्धभोग पुढें पावे ॥३८॥ निर्दैवें साधितां निधान । पुढें ठाके एखादें विघ्न । तैसें माझें दिव्य दारुण । मिथ्या गेलें जनवाणी ॥३९॥ करांडितां[1] नारिकेळासी । चंचु चिरोनि झाली कैसी । तो शुक पुन्हां त्या वृक्षासी । कल्पांतीहीं न शिवे ॥४०॥ तरी या समस्तां देखतां जाण । माये धरणीचें हृदय प्रवेशून । साहिला न वचे निंदापमान । मिथ्यापवाद जनाचा ॥४१॥ ऐसें विचारोनि राघवसुंदरी । करुणावचनीं प्रार्थना करी । म्हणे माये अवनिये[2] उदरीं । ठाव देईं मजलागीं ॥४२॥ मी वो तुझें अपत्य तान्हें । कृपा करीं मज उदार मनें । तुवां धरिलीं चतुर्दश भुवनें । अगाधपणें निजहृदयीं ॥४३॥ तुवां हृदयींची परम वाड । उदरीं धरिला विरंचिअंड । सप्तसागर गिरी प्रचंड । तुझिये कुक्षीमाजी वसती ॥४४॥ अठरा भार वनस्पती । आणि विरंचीची प्रपंचस्थिती । या सकळां तूं जीवविती । ऐसी तुझी थोरीव ॥४५॥ ऐसें तुझें अगाधपण । तुझे ठायीं शांति दया पूर्ण । नाहीं मान्यता मानापमान । हें थोरपण तुज ऐसें साजे ॥४६॥ तुजलागीं जाळिती पोळती । चिरोनियां विदारिती । तयांतें तूं मिष्टान्नदाती । होतेसी उदारपणें ॥४७॥ तुजवरी एकीं स्वधर्माचरण । केलें त्याचा नाहीं अभिमान । दुजियानें करोनि आनेआन । तयाचा खेद न वाहसी ॥४८॥ एक तुजलागीं आर्तीं[3] पूजिती । दुजे लातांवरी तुडविती । त्यांचा न मानिसी विषमभाव चित्तीं । न धरिसी गंगेसारिखा ॥४९॥ तरी मी तुझें हृदयींचे बाळ । तूं माता परम दयाळ । मज हृदयीं राख ये वेळ । अपत्य

शब्दार्थ – १. साल काढितां, २. हे पृथ्वी, ३. आवडीनें.

दीन म्हणोनि ॥५०॥ जरी म्यां निर्मळ मनें श्रीरघुनाथ । आराधिला असेल सत्य । तरी तूं ठाव देई कृपायुक्त । निजअपत्य म्हणोनी ॥५१॥ लक्ष्मण ब्रह्मचारी । शेषावतार निर्धारीं । हें सत्य असेल निश्चयें तरी । निजोदरीं मज सांठवीं ॥५२॥ पांचाळी जे द्रुपदतनया । जे कां पांचां पांडवांची जाया[1] । सत्य पतिव्रता म्हणती तिया । प्रातःस्मरणीं योगीश्वर ॥५३॥ पतिव्रता अनसूया निर्धारें । पतिचरण प्रक्षाळोनि उरलेनि नीरें[2] । ब्रह्मा विष्णू महेश लेकुरें । पायांवरी न्हाणिलीं ॥५४॥ ते अनसूया आदिशक्ती । तिचे पुण्यें मज धरित्री । ठाव देईल काकुळती । देखोनि ग्लांती पैं माझी ॥५५॥ नैष्ठिक बटु[3] अंजनीतनुज । कपिवाहिनीचा दक्षिणभुज । सत्य तरी तूं मज । निजहृदयीं राखावें ॥५६॥ ब्रह्मतनया अहल्या जाण । जें कां गौतमगृहींचें मंडण । इंद्रें भोगिली करोनि छळण । ऋषिशापें पाषाण पैं झाली ॥५७॥ ते पवित्रता म्हणती पुराणीं । वदतसे व्यासादिकांची वाणी । तियेचे पुण्यें हे धरणी । निजहृदयीं सांठवो मातें ॥५८॥ सद्गुरु वसिष्ठ ब्रह्म पूर्ण । ऐसें बोले वेदपुराण। जरी म्यां केलें असेल भजन। तरी मार्गदान मज दीजे ॥५९॥ गुरु माता गुरु पिता । सद्गुरूवांचोनि नाहीं दुजा तारिता । ऐसी सत्य वाचा असेल तरी आतां । पृथ्वी मार्ग देईल ॥६०॥

**सीतेचा धरणीत प्रवेश :** ऐसें जानकीमुखींचें वचन । ऐकोनि धरा उल्हासोन । भागद्वय झाली कारण । देखोनियां सीतेचें ॥६१॥ जेंवी स्वातीचे जळतुषारें । भागद्वय शिंपला अति आदरे । होवोनियां उदरीं नीरें । समावित वर्षाकाळीं ॥६२॥ जेंवी गौतमभगीरथसामर्थ्यें । भागद्वय गंगा आणिली येथें । पुढें पूर्वसमुद्रातें । मिश्रित होवोनि मिनलिया ॥६३॥ तैसी दों ठायीं झाली धरणी । ऐसे देखोनि श्रीरामपत्नी । नमस्कार करोनि सभासदनीं । श्रीगुरु मनीं चिंतिला ॥६४॥ हृदयीं धरोनि श्रीरामध्यान । नमस्कारोनि सिंहासन । धरणिये करोनि नमन । पुढें काय देखती झाली ॥६५॥ अवलोकोनि पृथ्वींत पाहे । तों रत्नजडित सिंहासन माथां आहे । ऐसा एक पुरुष गमताहे । जानकीस ते समयीं ॥६६॥ माथां घेवोनि सिंहासन । तिष्ठत उभा राहोन । जेंवी स्वामिकार्यार्थ लक्षोन । सेवेसी भृत्य[4] राहे ॥६७॥ पूजावया कैलासपती । पूजासंभार सेवका हातीं । घेवोनि निघे सहित पार्वती । पाताळभुवनातें ॥६८॥ पाताळी वसे हाटकेश्वर । तयाचें पूजेलागीं विद्याधर[5] । सेवकमाथां नाना उपचार । देवोनियां जात जैसें ॥६९॥ किंवा शेष घेवोनि पृथ्वीभार । कीं कूर्म पृष्ठ करोनि कठोर । तैसें माथां सिंहासन सुंदर । पुरुष एक उभा असे ॥७०॥ ऐसा अवनीच्या जठरीं । रत्नसिंहासन घेवोनि शिरीं । उभा तिष्ठत प्रतीक्षा करी । तें जानकीनें देखिलें ॥७१॥ संतोष झाला अति मनीं । म्हणे मज हे तुष्टली अवनी । शेषमाथां सिंहासन देवोनी । मज मूळ पाठविलें ॥७२॥ ऐसें भावोनि[6] ते समयीं । जानकीं सिंहासनीं बैसली पाहीं । मग प्रवेशती झाली हृदयीं । पृथ्वीचिये ते काळीं ॥७३॥ भागद्वय अवनी एक झाली । जैसी स्वातीजळें शिंपीमुखें मिळालीं । याउपरी कथा वर्तली । ते श्रोतीं सादर ऐकिजे ॥७४॥ समस्तां झालें आश्चर्य । तटस्थ ठेले ऋषिवर्य । स्वर्गवासी देव सर्व । पुष्पवर्षाव करिते झाले ॥७५॥

**सीतेच्या गमनामुळे सर्वांस दुःख :** वानरां झाले परम क्लेश । हनुमंता खेद बहुवस । दुःखें दाटला जगदीश । जानकीच्या गमनें हो ॥७६॥ चिंतातुर समस्त माता । सुख पावली कैकेय-दुहिता । देव म्हणती चतुर सीता । किती अपवाद सोसील ॥७७॥ ऐसें वर्तलें ते समयीं ।

---

शब्दार्थ – १. स्त्री, २. उदकाने, ३. ब्रह्मचारी, ४. सेवक, देवयोनिविशेष, ६. कल्पून.

देखोनि श्रीराम शोकार्णवांत पाहीं । शोक करिता झाला वैदेही । हातींची गेली म्हणोनी ॥७८॥ अवो प्रिये तुजकारण । खडतर सेविलें अरण्य । पादपां पाषाणां आलिंगन । प्रेमोनियां देत होतों ॥७९॥ श्वापदां पुसें सीता कोठें । उलंघीं खेटें[1] खर्वटें[2]। पायीं मोडती दीर्घ कांटें । पडें उठें मूर्च्छित ॥८०॥ सीता सीता आक्रंदोनी । दश दिशां हिंडें मेदिनीं । मार्गीं भेटे तयालागोनी । पुसें जानकी कोणीं देखिली ॥८१॥ तुजलागीं वानरांसीं सख्य केलें । तुजलागीं समुद्र शिळीं बुजिले । तुजलागीं अराक्षसी केलें । रावण वधोनि लंकेसी ॥८२॥ विराधें हरिलें जे काळीं । तैं अवेक्षितां[3] वनस्थळीं । राक्षस वधोनियां धुळी । क्षणामाजी मेळविला ॥८३॥ चित्रकूटी काकें क्षतविक्षत केलें । तयावरी म्यां ईशिकेतें मोकलिलें । पुढें काग मागें ईषिका पाताळें । हिंडोनियां स्वर्गा गेली ॥८४॥ नारदवचनें तुज शरण । काग म्हणे ईषिका निवारीं दारुण । ग्लांति देखोनि माझें स्तवन । तयालागीं त्वां केलें ॥८५॥ तुझेनि वचनें तया न मारून । वामनेत्रास त्याच्या केलें छेदन । ऐसी आज्ञा प्रमाण । म्यां नाहीं उल्लंघिली ॥८६॥ ते तूं आजि कां वो रुसलीस । मज सांडोनि पाताळा गेलीस । तरी तुज काय पातले यश । पतिवचनास उल्लंघूनि ॥८७॥ मी काय तुझें चुकलों । कोणे अन्याया आचरलों । पूर्वी लोकलाजे भ्यालों । वना पाठविलें म्हणोनी ॥८८॥ अवो अवनिये अवधारीं । माझी सीता तुझे उदरीं । जन्मली तूं माझी सासू खरी । जानकी पाठवीं मजपासीं ॥८९॥ तुझें उदरीं उत्पन्न । झाली सीता निश्चयें जाण । तरी आतां पुनरपि दान । देईं वो तू मजलागीं ॥९०॥ ऐसी करुणा करितां राजीवनयनें । दुखावलीं समस्तांची मनें । गाई दांतीं न धरती तृणें । न पीता जीवनें सीताविरहें ॥९१॥ क्रोधा चढला कार्मुकपाणी । अग्निबाण लावोनि गुणीं । म्हणे पूर्वी सांडिली दाहोनी । पुनरपि दग्ध करीन ॥९२॥ माझी प्रिया हरिली इणें । न बोले मजसीं धरोनि मौनें । नवखंड करीन एक्या बाणें । रुद्रावेशें कोपला ॥९३॥ कोपला देखोनि चापशरपाणी । देव चिंतातुर मनीं । तंव विधाता पुढें होवोनी । बोलता झाला श्रीरामासी ॥९४॥ ब्रह्मा म्हणे श्रीरामचंद्रा । अरिदळणी प्रतापरुद्रा । कल्याणवंता भुजंगशयना राजेंद्रा । वचन गुणसमुद्रा अवधारीं ॥९५॥ अनंतब्रह्मांडांचा नायक । भास्करकुळीं कुळदीपक । पुण्यश्लोक त्र्यंबक । तुज ध्यात हृदयकमळीं ॥९६॥ तूं या चराचराभूतां प्रतिपाळिता । तूं या सकळां भूतां स्रजविता । प्रळयांतीं संहार करिता । कळिकाळा माथां आज्ञा तुझी ॥९७॥ तो तूं लीला-सूत्रधारी । अवतार धरिसी नानापरी । विरंचिअंडांची माळ तुझ्या उदरीं । रोमरंध्रीं भासत ॥९८॥ ऐसा तूं त्रैलोक्यनायक । अवतरोनि मायाकौतुक । खेळ खेळसी वाल्मीक । वदला होता पूर्वी जें ॥९९॥ अनागत भाष्य ऋषीश्वरें । वाल्मीकें कथिलें ब्रह्मवरें । शोधोनि पाहिलें विभागद्वारें । तीन अंश पैं केलें ॥१००॥ ती हे कथा येथपर्यंत । वाल्मीकमुखींची झाली सत्य । पुढें आता उरली किंचित । ते अनुपम्य पैं असे ॥१॥ ते श्रवण करावया अधिकारी । नाहींत जीव पृथ्वीवरी । श्रीरामकथा अमृतलहरी । ऐकावया पुण्य पाहिजे ॥२॥

आकाशवाणी : ऐसें शब्द चतुराननें । वदत असतां मार्गगगनें । वाणी झाली ती रघुनंदनें । परिसिली विधात्यासहित ॥३॥ ते वाणीचें रूप कैसें । तीस देह शिर वाचा नसे । अव्यक्त परी व्यक्त जैसें । वदे एखादा आगळें ॥४॥ आप्त एखादे अवसरीं । संकटा हितोपदेश करी । तैसी ते समयीं वाचा अशरीरी । काय म्हणती पैं झाली ॥५॥ वाणी नव्हे ती गंधर्वनगरींची

शब्दार्थ – १. खेडी, २. गावे, ३. पाहता, ४. पाणी.

देवता । दुःखित देखोनि जामदग्न्यजेता[1] । संबोधूं आली आप्तता । निजदुहितेच्या पतीतें ॥६॥ वाणी नव्हे ती कुळस्वामिनी । दुःखित श्रीरघुनाथ देखोनी । संबोखोनी हितवचनीं । काय बोलती पैं झाली ॥७॥ वाणी नव्हे हे कालरात्री । संबोखावया श्रीरघुपती । आश्वासनातें झाली देती । हितोपदेशवचनेंकरोनी ॥८॥ वाणी म्हणे श्रीरघुनंदना । पूर्णब्रह्म सनातना । योगियांच्या विश्रामस्थाना । कैलासरमणा प्रियकरा ॥९॥ भक्तजनभयभंगा । महेशाच्या प्राणलिंगा । भरतादिबंधुवर्गा । प्रियकरा श्रीरामा ॥११०॥ मदनाचिया तूं जनका । वैदेहीच्या प्राणनायका । मिथ्या सांडीं या शोका । उरग त्वचा[2] पैं जैसी ॥११॥ वाल्मीकमुखीचें हें निरूपण । संपूर्ण कथिलें रामायण । ते हें झालें सत्य जाण । किंचित शेष उरलेंसें ॥१२॥ तें आकर्णिजे[3] रविकुळभूषणा । अनागत भाष्य रामायणा । अधिकार नाहीं इतर जना । श्रवण करावया तेथींचें ॥१३॥ उर्वरित कथेचे अधिकारी । ऐकावया नाहीं ये चराचरीं । पुत्रांसमवेत रावणारी । एकांतीं श्रवण पैं कीजे ॥१४॥ जानकीच्या वियोगें गहन । दीर्घ दुःख करणें मिथ्या जाण । तूं परमात्मा श्रीनारायण । लीला दाविसी नानापरी ॥१५॥ लक्ष्मीलागीं ये लोकीं । पुनश्चरणें साधकीं । करिजेताती ते लक्ष्मी निकी । वैकुंठीं पैं वसताहे ॥१६॥ घेवोनी मायेची बुंथी । बहुरूपी सोंगें संपादिती । तैसी तुझी अवतारस्थिती । नाना चरित्रें दाखविसी ॥१७॥ तुझी भार्या हरिली रावणें । हें मिथ्या बोलावयाकारणें । लटकें जगीं मिरवणें । ऐसा खेळ खेळसी ॥१८॥ वृक्षापासोनियां छाया । हरिली हें बोलणें वायां । तैसी रावणें हरिली जाया । हें लौकिकीं उरलेंसे ॥१९॥ अमृतापासोनि गोडी । कोण चतुर बाहेर दवडी । सुवर्णाची कीळ[4] काढी । ऐसें काय घडेल ॥१२०॥ मक्षिका सर्व रस चाखे । अग्नी भक्षितां मरण ठाके । उन्मत्त झालेनि जंबुकें । सिंहा काय जिंतवेल ॥२१॥ ऐसी लंकेशें तुझी भार्या । हरिली मिथ्या रघुराया । आपुलें पूर्णत्व शोधोनियां । निजस्थिती राहे उगा ॥२२॥ आकाशवाणीचीं ऐसीं उत्तरें । परिसोनियां श्रीरघुवीरें । सभा विसर्जून दोनी पुत्र करें । धरोनी देवगृहीं प्रवेशला ॥२३॥ सद्‌गुरु वसिष्ठासमवेत । देवगृहीं प्रवेशला श्रीरघुनाथ । एका जनार्दना विनवित । सावचित्त परिसावें ॥२४॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां जानकीपातालगमनं नाम त्रिसप्ततितमोऽध्यायः ॥७३॥ ओंव्या ॥१२४॥

## अध्याय चौऱ्याहत्तरावा

॥ श्रीआत्मारामाय नमः ॥

### भरताकडून गंधर्वांचा पराजय

आकाशवाणीचें उत्तर । ऐकोनियां श्रीरघुवीर । करीं धरोनियां कुमर । यज्ञशाळे प्रवेशला ॥१॥ क्रमोनियां तेथे शर्वरी । प्रातःकाळीं दूषणारी । स्नानसंध्या करोनि ते अवसरी । ऋषींसहित बैसला ॥२॥ सभामंडळीं थोर थोर । मिळाले राक्षस वानर । प्रधान सेनानायक ऋषीश्वर । नगरींचें नागरिक लोक ॥३॥ आज्ञा देवोनि लहुकुशांतें । श्रीरामें आरंभिलें रामकथेतें । ऐकतां सुख व वाटे चित्तें । परम व्याकुळ पैं झाला ॥४॥ पाहूं लागला चहूंकडे । न देखे जानकीचें रूपडें । म्हणे दिशा दृष्टी उद्वस पडे । अंधकार दाटुनी ॥५॥ माझिये जानकीवीण ।

शब्दार्थ – १. श्रीरामचंद्राला, २. कातडी, ३. ऐकावे, ४. तेज.

उल्हास अवघें विरंचिभुवन । मज राज्याची चाड कोण । सभा विसर्जून ऊठिला ॥६॥ नावडे राज्यभोगोपचार । नावडे छत्रचामर । नावडे गायन सुस्वर । अवस्था थोर सीतेची ॥७॥ नावडे शास्त्रव्याख्यान । नावडे ध्रुवपदश्रवण । नावडे हरिकथाकीर्तन । चिंता गहन सीतेची ॥८॥ नावडे पारधी वनविहार । नावडे राज्यपदींचा दळभार । नावडे इष्ट बंधु सहोदर । नावडती प्रकार वाद्यांचें ॥९॥ सीतेची गौरवर्ण तन । निंबलोणा ओंवाळिजे कोटि मदन । जीतें देखोनि कनकहरण । पक्षिगण भूलले ॥१०॥ जानकीचेनि सुंदरपणें । उदरा येइजे मदनें । ते रूपें श्रीरघुनंदनें । ध्यानमुद्रेस आणिलें ॥११॥ ध्यानीं आणोनियां सीता । हृदयीं धरोनि झाला ध्याता । पुढें काय वर्तली कथा । ते सावधान श्रोतें अवधारा ॥१२॥

यज्ञे यज्ञे प्रकुरुते सीता यत्र हिरण्मयी । दशवर्षसहस्राणि वाजपेयमुपागमत् ।

वाजपेया दशशता बहुसौवर्णदक्षिणाः । अग्निष्टोमातिरात्राभ्यां गोसवश्च ग्रहासवैः ॥२॥

ईजे क्रतुशतैरन्यैः स श्रीरामः सदक्षिणैः । एवं स कालः सुमहान् राघवस्य महात्मनः ॥३॥

यज्ञ करी श्रीरघुनाथ । दहा सहस्र वर्षेपर्यंत । सीता सुवर्णाची केली होती तीसहित । यागादि कर्में संपादी ॥१३॥ दहा सहस्र वर्षेंवरी । याग करितां पौलस्त्यारी । सुवर्णदक्षिणा भारी । ऋषींलागीं देतसे ॥१४॥ तरी ते याग कोण कोण । सांगेन तयांचें नामाभिधान । यज्ञामार्गें जो जो यज्ञ । अनुक्रमें परियेसा ॥१५॥ वाजपेय ज्योतिष्टोम । तिजा अतिरात्र । गोसव[1] ऐसा चतुर्थ परम । ग्रहासव पंचम अवधारा ॥१६॥ अश्वमेध नाम सहाव्याचें । चैत्य सप्तम जाणा साचें । आणिकही नानापरींचे । साचे याग बहुविध केले ॥१७॥ ऐसिये प्रकारें सकळ यज्ञ । करी श्रीराम रविकुळ भूषण । द्विजां देवोनि बहु सुवर्ण । काळ क्रमी यापरी ॥१८॥ राज्य करितां श्रीरघुनाथा । त्रैलोक्यींचे भूप वंदिती माथां । ऋक्षां[2] आणि कपींतें समस्तां । श्रीरामाज्ञा प्रमाण ॥१९॥

काले वर्षतु पर्जन्यः सुभिक्षं विमला दिशः । हृष्टपुष्टजनाकीर्णं पुरंदरपदं यथा ॥४॥

न बालो म्रियते कश्चिद्ग्रामे राज्यं प्रशासति । नाधर्मो विद्यते कश्चिन्न व्याधिः प्रणिनां क्वचित् ॥५॥

रामराज्याची थोरवी : श्रीरामाज्ञा काळाचे शिरीं । यथाकाळीं मेघ वृष्टि करी । तेणें धान्यें महीवरी । उत्पन्न होती बहुसाल[3] ॥२०॥ सदाकाळ सुभिक्ष[4] । पातकाचें परम दुर्भिक्ष । चंद्र आणि दिनेश । सौम्यतेजें तपताती ॥२१॥ दिशा विमला प्रकाशकरा । नाहीं अभ्र धुई वारा । धष्ट पुष्ट जन नगरा । माजी वास करिताती ॥२२॥ जैसी पुरंदराची नगरी । तीहूनि विशेष साकेतपुरी । मृत्यूचें भय स्वप्नजागरीं । बाळकांतें नाहीं कल्पांतीं ॥२३॥ श्रीरामाचे आज्ञेकरून । काळ बंदीं श्रीरामचरण । श्रीरामराज्याचा धाक गहन । दूत लोटांगण यमाचे करिती ॥२४॥ अधर्माची नाहीं वार्ता । घरोघरीं श्रीरामकथा । व्याधि रोग जरा व्यथा । रामराज्यीं पैं नाहीं ॥२५॥ ऐसें बहुकाळवरी श्रीरामें । पुत्रपौत्रांसहित नेमें । राज्य केलें परम धर्में । बंधुसुहृदांसहित पैं ॥२६॥ पुढील कथा कौतुकलहरी । वाल्मीकमुखींची वागीश्वरी । कवित्व तारूं भवसागरीं । उतरावया जना घातलें ॥२७॥ या तारुवाचे जो स्मरण करी । तया भय नाहीं संसारीं । याचें जो श्रवण करी । तया श्रीहरि सन्निध ॥२८॥ या तारुवाचा जो भोक्ता । कैलासनाथचि तत्वतां । पार्वतीसहित एकांता- । माजी कथा श्रीरामाच्या ॥२९॥ कथेसि झाली आडकथा । पैस न म्हणावें श्रोता । रंगीं नृत्य करितकरितां । त्यागं

शब्दार्थ - १. गाईचा यज्ञ (हा कलींत वर्ज्य) २. अस्वलांना, ३. अनेक प्रकारची, ४. सवंगाई

येवोनियां पडे ॥३०॥ अध्ययनाचेनि प्रसंगें । अनध्याय तो पडे मार्गे । तैसें कथेचेनि रंगें । दृष्टांत पुढें येऊ ठाके ॥३१॥ तंव श्रोते म्हणती वक्तया । पुढील कथा सांगावया । सद्गुरु स्मरोनि लवलाह्या । कथामार्ग चालवीं ॥३२॥ ऐकोनि श्रोतयांचें वचन । आनंदें निवाला एका जनार्दन । म्हणे स्वामी तुमचे मनोदेवतेचें प्रसन्नपण । मजलागीं पैं व्हावें ॥३३॥ तुमची कृपाकटाक्षनदी । तेथें मी तरेन पदोपदीं । आतां पुढील निरूपणसिद्धी । सावकाशीं अवधारा ॥३४॥

राममातांचें निधन : रामें राज्य करितां अयोध्येसीं । बहुकाळ क्रमिला स्वधर्मेसीं । पुढें माता वार्धक्यतेसीं । देहांतसमयो पावल्या ॥३५॥ जैसें घटींचें जीवन आटतां । प्रतिबिंबी न भासे सविता । तेंवी वार्धक्यें तिघी माता । देहांता पावल्या ॥३६॥ चवघां बंधूंसमवेत । उत्तरक्रिया विधानोक्त । दानें देवोनि द्विज तृप्त । द्वादशविधि पैं केला ॥३७॥ चवघांजणीं पिंडदाना । करोनियां गयावर्जना[1] । माता उद्धरोनि स्वर्गभुवना । दशरथापासीं पाठविल्या ॥३८॥ स्वर्गीं स्थापोनियां माता । स्वधर्मे असतां श्रीरघुनाथा । तंव भरतमातुलाच्या पुरोहिता । आगमन अयोध्यें पैं झालें ॥३९॥

गर्गमुनींचे अयोध्येंत आगमन : राजहेरीं श्रीरामासी । वार्ता जाणविली स्वामी परियेसीं । पुरोहित भरतमातुलाचा गर्गऋषी । तुमचे भेटीस पैं आला ॥४०॥ अनुजांसहित रघुनंदन । सामोरा येवोनि स्वयें जाण । मातामहपुरोहिता देवोनि मान । राजसदना आणिला ॥४१॥ दीर्घ उपचारें करोनि पूजन । स्वपंक्तीसीं सारोनि भोजन । दिव्य वस्त्रें अलंकारभूषणें । गर्गऋषीसी अर्पिलीं ॥४२॥ श्रीराम म्हणे जी गर्गऋषी । वृद्धपरंपरा राजगुरु कैकेयभूपासी । जैसा वसिष्ठ सूर्यवंशीं । तैसे तयासी निजपूज्य ॥४३॥ ऐसे तुम्ही पूज्य थोर । विवेकवैराग्यें चतुर । करावया आमचा उद्धार । कृपेनें आलेति येथवरी ॥४४॥ भाग्य थोर आजि आमुचें । म्हणोनि येणें झाले तुमचें । कुशलत्व यजमानस्वामीचें । परिवारें क्षेम असती कीं ॥४५॥ गर्ग म्हणे श्रीरघुराजा । क्षेमवंत तुझिया भुजा । प्रतापाची उभवोनि ध्वजा । दशदिशा तेजें झळकत ॥४६॥ अरिराया तोडरीं । काळ आज्ञा वंदी शिरीं । जयाची काठी तपे अंबरीं । तो सद्गुरु[2] गृहामाजी ॥४७॥ कल्पवृक्ष गृहीं ज्याचे । चिंतामणी पाषाण नानापरींचे । नित्य दुभतें कामधेनूचें । त्या पुरुषाचें भाग्य काय वानूं ॥४८॥ चारी वेद बंदिजन । सहाही शास्त्रें गुणवर्णन । अठरा पुराणें करिती स्तवन । निरंतर जयाचें ॥४९॥ तो तूं पूर्णब्रह्म श्रीरघुनाथ । द्विजांचें वाढविसी महत्त्व । देवी अकळ तुझे चरित्र । महापुरुषा श्रीरामा ॥५०॥

श्रीरामांना भेट समर्पण : परी कांहींएक किंचित तुम्हांकारणें । कैकेयाधिपें पाठविले तें अंगीकारणें । जैसें कल्पतरूसी पूगीफल ठेवणें । आपुलिया यथानुशक्ती ॥५१॥ म्हणोनि भेटीस उत्तम वारू । जे श्यामकर्णाहूनि सुंदरू । हां हां म्हणतांचि सत्वरू । पूर्वेचे पश्चिमे येती ॥५२॥ हकारातील अकार । वाचे करिता उच्चार । तंव पूर्वीच अक्षरोत्तर । चिंतिले ठायासी जातसे ॥५३॥ हकार अकारा होतां भेटी । तंव पूर्वीच दिशांचे शेवटीं । मनोवेगचपळते उठाउठीं । उणीव होय वारूंपुढें ॥५४॥ ऐसे वारू दहा सहस्र । पृथ्वीस न लाविती खुर । रत्नाभरणीं सालंकार । श्रीरामापुढें उभे केले ॥५५॥ तदुपरी कुंजरभार । जैसे चौचरणींचे गिरिवर । चौदंतमंडित सालंकार । शुंडा सुंदर जयांची ॥५६॥ दोहीं कर्णीं भूषणें विचित्रें । जैसी शोभती रंभापत्रें[3] । तयांवरी श्वेतचामरें । दोहीं कर्णीं बांधिली ॥५७॥ गुढारिले नाना

शब्दार्थ - १. गयाश्राद्धादि कर्मे, २. वसिष्ठ, ३. केळीचीं पानें.

अंबरीं । तैसें मेघडंबर गिरिवरीं । तैसेचि रथ अयुतवरी[1] । शृंगारोनि आणिले ॥५८॥ अनेक वस्त्रें दिव्यांबरें । नाना रंगांची रुचिरें । मुक्ताफळें पाच वैडूर्य हिरे । श्रीरामासी समर्पिले ॥५९॥ दिव्य रत्नांचिया माळा । समर्पिल्या घननीळा । अनेक जातींचिया पक्षिकुळा । भेटी श्रीरामासी दीधली ॥६०॥ हे भेटी समर्पोनि श्रीरामासी । आसनीं बैसलासे ऋषी । श्रीराम म्हणे गर्गासी । अपूर्व आम्हांसी पाठविलें ॥६१॥ आम्हीं पूर्वी नाही आयकिलें । तें मातुळें प्रीतीनें पाठविलें । विशेष तुमची पाउलें । दृष्टी देखिलीं गर्गमुनें ॥६२॥

रामस्य भाषितं श्रुत्वा महर्षिः कार्यविस्तरम् । वक्तुमुद्‌भूतांतरात्मा राघवायोपचक्रमे ॥६॥
सुधाजित्प्रीतिसंयुक्तः श्रूयतां यदि रोचते । अथ गंधर्वरचितः फलमूलोपशोभितः ॥७॥
सिंधोरुभयतः पार्श्वे देशः परमशोभनः । तं तु रक्षंति गंधर्वाः सायुधा युद्धकांक्षिणः ॥८॥
शैलूषस्य सुता वीरस्तिस्रः कोट्यो महाबलाः । तांस्तु निर्जित्य काकुत्स्थ गंधर्वनगरं शुभम् ॥९॥
निवेशय महाराज पुरे द्वे सुसमाहितः । अन्यस्थ न गतिस्तत्र देशश्चायं सुशोभनः ॥१०॥
रोचतां ते महाबाहो न हि वः सदृशं भवेत् ॥११॥

दाशरथीचें ऐकोनि वचन । हृदयीं निवाला ब्राह्मण । जैसें वसंतीं कोकिळालापन । निववी मन पांथिकांचें ॥६३॥ ऐसियापरी गर्गऋषी । सविस्तर सांगे श्रीरामासी । म्हणे तुमच्या मातुळें महत्कार्यासी । पाठविलें राजेंद्रा ॥६४॥

गंधर्वनगरी जिंकून घेण्याचा भरताच्या मामाचा संदेश : ते कोण काय किंलक्षण । युधाजित कैकेयनंदन । जो कां तुम्हां मातुल जाण । प्रिय बहु भरतासी ॥६५॥ तुमच्या ठायीं त्याची प्रीती । बहुत आर्त[2] जी रघुपती । जैसी धेनु वत्सा चिंती । चकोर चिंती चंद्रातें ॥६६॥ युधाजितें तुम्हांलागून । रुचे ऐसें माझ्या मुखें कथन । करविलें तें सावधान । बंधूसमवेत अवधारा ॥६७॥ सिंधुनदीचे उभय तीरीं । पुष्पीं फळीं अति साजिरी । गंधर्वी वसविली नगरी । जे सुरासुरीं अतर्क्य ॥६८॥ तेथील राजे गंधर्व जाण । सिंधुदेशाचें करिती पाळण । तयांचें तीस कोटी सैन्य । युद्धीं आंगवण बहुसाल तयां ॥६९॥ श्रीरामा जिंतोनि त्यातें । नगरें दोन वसवावीं तेथें । ऐसें सांगोनी युधाजितें । मजलागीं पाठविलें ॥७०॥ काळासी प्रवेश नाहीं तेथ । अन्यत्र साधारणाची कोण मात । तूं काळाचा काळात्मा श्रीरघुनाथ । युद्धीं गंधर्व विभांडीं ॥७१॥ जरी येईल तुझिया मना । तरी विलंब न करीं श्रीरघुनंदना । जैसे वृद्धाविवाहीं लग्ना । अति त्वरा करावी ॥७२॥

तच्छ्रुत्वा राघवः प्रीतो महर्षेरतुलं वचः । उवाच बाढमित्येव भरतं चान्ववैक्षत ॥१२॥
सोऽब्रवीद्राघवो हृष्टः प्रांजलिप्रग्रहो द्विजम् । इमौ कुमारौ विप्रर्षे तं देशं विजयिष्यतः ॥१३॥
भरतस्यात्मजौ वीरौ तक्षः पुष्कर एव च । मातुलेन च गुप्तौ वै धर्मेण सुसमाहितौ ॥१४॥
भरतस्त्वग्रतः कृत्वा कुमारौ च पदानुगौ । निहत्य गंधर्वसुतान्पुरे द्वे तु करिश्यति ॥१५॥
निवेश्यते पुरे रम्ये स्वात्मजौ विनिवेश्य च । आगमिष्यति मे ब्रह्मन्समीपे स तु धार्मिकः ॥१६॥
एवमुक्त्वा तु ब्रह्मर्षि भरतं सबलानुगम् । आज्ञापयामास ततः कुमारावभ्यषिंचयत् ॥१७॥
नक्षत्रेण च सौम्येन पुरस्कृत्यांगिरस्तुतम् । भरतः सेनया सार्धं कुमारौ च विर्सर्जितौ ॥१८॥

भरतपुत्रांना राज्याभिषेक व भरताचे युद्धार्थ गमन : युधाजित् पुरोहिताचें वचन । ऐकोनियां श्रीरघुनंदन । संतोषें न माये गगन । ऐसा उल्हास पैं झाला ॥७३॥ तें वचन तरी विचारितां

---

शब्दार्थ - १. दहा हजारांवर, २. आवड.

कैसें । वैराग्यसिंधूचें भरितें जैसें । कीं आनंदवनींचें हंस । कीं मानसें योगियांची ॥७४॥ कीं चिदाकाशीं[1] बोधदिनकरू । कीं धैर्यगगनींचा अढळ धुरू[2]। कीं नवविधभक्तीचा शृंगारू । शब्दरूपें प्रकटला ॥७५॥ ऐसें वचन गर्गमुनीचें । परिसोनि हृदय श्रीरामाचें । निवालें मग म्हणे सुवाचे । बरवें वदलेति ऋषिराजा ॥७६॥ आजि संतोष माझिया चित्ता । झाला जी मातुलपुरोहिता । हे भरतात्मज दोघे तत्वतां । गंधर्वदेशीं राज्य करोत ॥७७॥ हे दोघे भरत-नंदन । तक्ष पुष्पक यांचे अभिधान । मातामहाचे प्रिय पूर्ण । पढियंते जाण मातुलासी ॥७८॥ या दोघां पुत्रांसहित । पुढें करोनियां भरत । पायदळसेना अमित । युद्धालागीं नेइजे ॥७९॥ सेनेसहित राजा भरत । युद्धीं जिंतील गंधर्व समस्त । पुरें दोनी वसवोनि तेथ । पुत्रां राज्य देईल ॥८०॥ नूतन वसवोनि पुरद्वयासी । राज्यीं स्थापील निजपुत्रांसी । विजयी होवोनि भेटीसी । माझिये येईल मुनिराया ॥८१॥ ऐसें बोलोनि पुरोहिताप्रती । भरतासि आज्ञा देवोनि श्रीरघुपती । म्हणे निजपुत्रां हर्षें अती । पट्टाभिषेक करावा ॥८२॥ माझिये दृष्टीपुढें । राज्याभिषेक करीं वाडेंकोडें । निवेल हृदय सुख गाढें । मजलागीं होईल ॥८३॥ ऐसी आज्ञा श्रीरघुपतीची । होतांच माता कैकयी ज्याची । तेणें भरतें सामग्री पट्टाभिषेकाची । तत्काळ जाण आणविली ॥८४॥ अभिषेकोनि दोघां पुत्रांतें । श्रीरामें दिधलीं दोनी छत्रें । चामरें शिबिका तयांतें । दोघांलागीं दीधली ॥८५॥ श्रीरामाज्ञा लाहून । निजपुत्रेंसीं कैकेयीनंदन । सेनासमवेत बळ-वाहन । नगराबाहेर निघाला ॥८६॥ पालाणिले भद्रजाती । वारू कोट्यनुकोटी नेणों किती । रथ घडघडाटें हे क्षिती । उलथूं पाहती ते समयीं ॥८७॥ पायदळ आलंगाइत । सोळी सांबळी बाणाइत । तुबक तिरताज अगणित । श्रीरामनामें गर्जती ॥८८॥ छप्पन्न कोटि चामुंडा । पत्रें घेवोनि धांवती पुढां । गंधर्वांच्या अशुद्धें सडा । भरत गाढा घालील ॥८९॥ श्रीरामबळें वीर गाढे । एक गर्जती एकांपुढें । भूतें प्रेतें राक्षसें मूढें । मांसभक्षणा निघालीं ॥९०॥ भूतगणेंसीं वेताळ । आनंदाचा गोंधळ । टाकोनि मागें भरतदळ । नवदुर्गाही निघाल्या ॥९१॥ जैसे समर्थाचे विवाहीं । वऱ्हाडी वऱ्हाडिणी लवलाहीं । तैसे भूतगण पाहीं । अवघियांपुढें निघाले ॥९२॥ ऐसिया प्रकारें श्रीरामानुजू । चालिला गंधर्वनगरा उजू । मार्ग क्रमोनि सेनासमाजू । मातामहदेशा पैं आला ॥९३॥ तद्दिनी तेथें करोनि वस्ती । सैन्यासहित दाशरथी । कैकेयाधिपें पूजोनि प्रीतीं । पुत्रास संगें दीधलें ॥९४॥

**भरताचे सिंधुदेशाला आगमन :** मातुलपुत्रासहित भरत । प्रतापें प्रयाण करित । प्रहर दोनी न भरतां तेथ । सिंधुदेशा पावला ॥९५॥ सिंधुनदीच्या उभयतीरीं । गंधर्वी वसविली नगरी । शोभा तिची अति साजिरी । अमरपुरीहूनि अधिक ॥९६॥ तेथें वसती गंधर्व जाण । तिहीं ऐकिलें सेना दारुण । घेवोनि आला कैकेयीनंदन । युद्धालागीं करावया ॥९७॥

श्रुत्वा तु भरतं प्राप्तं गंधर्वास्ते समागताः । योद्धुकामास्ततः सर्वे गर्जंति स्म समंततः ॥१९॥
तेषां समभवद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् । सप्तरात्रं तदासीद्धि न च प्राप्तस्तयोर्जयः ॥२०॥
ततो रामानुजः क्रुद्धः कालचक्रं सुदारुणम् । संवर्तं नाम तच्छस्त्रं गंधर्वेषु प्रयुक्तवान् ॥२१॥
ते विद्धाः कालचक्रेण संवर्तन विदारिताः । क्षणमात्रेण हि हतास्तिस्रः कोट्यो महाबलाः ॥२२॥

---

शब्दार्थ - १. शुद्धज्ञानरूपीं आकाशांत, २. ध्रुव (तारा).

हतेषु तेशु वीरिषु भरतः कैकेयीसुतः । निवेशयामास ततः समृद्धे द्वे पुरे तदा ॥२३॥

पुष्करं पुष्करवत्यां तक्षं तक्षशिलां प्रति । स्थापयामास तौ पुत्रौ भरतस्य महात्मनः ॥२४॥

गंधर्व-भरताचे युद्ध व गंधर्वांचा पराभव : आला ऐकोनि भरत । गंधर्व होवोनि एकीभूत । विचार करोनि समस्त । समरांगणा पैं आले ॥९८॥ युद्धेच्छा धरोनि मनीं । गर्जते झाले रणमेदिनीं । तेणें नादे फुटे अवनी । दिग्गजां कर्णीं बधिरत्व आलें ॥९९॥ समस्त एकवट मिळोन । उल्हासें वीरां येतसे स्फुरण । युद्धीं जयाशा धरोन । रणमंडळा पातले ॥१००॥ कवचें खड्गें गदापाणी । परिघ मुसळ तरुपाषाणीं । परस्परें भिडते झाले रणीं । उभयदळींचे वीरनायक ॥१॥ एक वर्षते झाले शर । एकीं टाकिले गिरिवर । एकीं गदाघातें मार । शस्त्रसंभार वर्षती ॥२॥ दोहीं दळीं वीर निधडे । कृतांताहूनि बळ गाढे । कोणी कोणाचेनि पुढें । न लोटती माघारें ॥३॥ वर्षाकाळीं जीमूतधारा[1] । तैसे वर्षती पाषाणतरुवरां । झोंटधरणीं[2] होय वीरां । दोन्हीं दळें एक झालीं ॥४॥ जैसीं दोनी एकवटती सरोवरें । तैसे दोन्ही दळींचे भेसळले वीर । परस्परें करिते झाले मार । हार जीत पैं नाहीं ॥५॥ ऐसें गंधर्वीं देखिलें । मग गंधर्वजाळ प्रेरिते झाले । आकाश अवनीमध्ये भरिले । चहूंकडे गंधर्व ॥६॥ भुली पडली भरतदळाचे वीरां । भयभीत झाले सैरावैरा । तंव गंधर्व एकसरां । युद्धीं लाग बहु केला ॥७॥ सोडोनियां अमित बाण । एकीं टाकिले पाषाण । एकीं गदामुद्गलीं जाण । असंख्य सैन्य मारिलें ॥८॥ भरतदळींचे थोर थोर वीर । कित्येक झाले रणीं चूर । कित्येक घायवट भग्नशिर । अशुद्धें डवरिलें पैं असती ॥९॥ एक म्हणती राया भरता । गंधर्वीं दाविली अधिकता । तंव कोप आला कैकेयीसुता । झाला ताडिता गंधर्वा ॥११०॥ रामानुज वीर बळी । गंधर्वांची फोडोनि फळीं । सीत चढवोनि ते काळीं । धनुष्य धरी वामकरें ॥११॥ तूणीरांतून काढोनि शर तेजाळ । सुवर्णपुंखांहीं[3] सोज्ज्वळ । जयांचें भाळांमाजी बिंबलें । हें सगळें ब्रह्मांड ॥१२॥ गुणीं चढवोनियां बाण । काळदंडाहूनि कठिण । वोढी काढोनि आकर्ण । परवीरांवरी सोडिला ॥१३॥ बाण जातांचि सत्वरें । कित्येकांची छेदिली शिरें । सप्तरात्र युद्ध वीरें । रामनुजें पैं केलें ॥१४॥ सात दिवसवरी । युद्ध राजा भरत करी । परी न ये जयहारीं[4] । क्रोधा भारी पैं चढला ॥१५॥ काळशस्त्र सुदारुण । बीजाक्षरें जपोनि पूर्ण । गंधर्व संवर्त लक्षोन । भरतवीरें सोडिलें ॥१६॥ संवर्त गंधर्वामाजी श्रेष्ठ । तयाचा काळशस्त्रें छेदोनि कंठ । उडविला आकाशा उजू स्पष्ट । कविठफळ जैसें कां ॥१७॥ तदनंतरें कैकेयीसुतें । तीस कोटी गंधर्वांतें । मारोनि टाकिली प्रेतें । रणसागरामाझारीं ॥१८॥ तंव मिळालिया वनदेवता । मांस भक्षोनि पिती शोणिता । आनंदें म्हणती भरता । विजयी होय पुत्रांसहित ॥१९॥

तक्षशिला व पुष्करनगराची स्थापना : तदनंतरे रायां भरतें । पुरें दोनीं वसविलीं तेथें । तयां नामें ऐका श्रोते । सावधान होऊनी ॥१२०॥ पुषकरावती नाम एकाचें । तक्षशिला दुसरियाचें । दोघां पुत्रा दो नगरांचें । राज्य दिधलें ते काळीं ॥२१॥ तक्षकातें तक्षकावती । पुष्करा पुष्कर नगराप्रती । स्थापोनियां भरत सुमती । निजसैन्येंसीं ठेविलें ॥२२॥ राज्यां स्थापोनि दोघे कुमर । गंधर्वांचे पद पदार्थ अपार । रत्नमणिमुक्ताफळें मनोहर । निजपुत्रांसी दिधलीं ॥२३॥ रथ अश्व भद्रजाती । रहंवरांसी नाहीं मिती । आणिकही राज्यसंपत्ती । पुत्रालागीं दीधली ॥२४॥ ते देशींचे जे लोक । ते केले आपुले आज्ञाधारक । पुढे भरत रघुनायक । भेटी

शब्दार्थ - १. मेघधारा, २. परस्परांचें केश ओढणें, ३. सुवर्णांच्या पिसाऱ्यांनी, ४. जय किंवा पराभव.

निघाला ते काळीं ॥२५॥ एका जनार्दना शरण । भरतें गंधर्वदेश जिंतोन । श्रीरामभेटीस आगमन । करिता झाला ते काळीं ॥२६॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां भरतगंधर्वविजयो नाम चतु:सप्ततितमोऽध्याय: ॥७४॥ ओंव्या ॥१२६॥ ॥ श्लोक ॥२४॥ एवं ॥१५०॥

## अध्याय पंचाहत्तरावा

॥ श्रीविश्वात्मने नम: ॥

लक्ष्मणाचे पाताललोकी गमन

निजपुत्रांसि स्थापोनि सिंधुप्रदेशीं । भरत निघाला श्रीरामभेटीसी । येवोनियां अयोध्येसी । अग्रजासी वंदिलें ॥१॥ सांगितला सविस्तर वृत्तांत । ऐकोनि संतोषला श्रीरघुनाथ । चंद्रा देखोनि उचंबळत । क्षीरार्णव जैसा हो ॥२॥ उदित होतां दिनकर । कुमुदिनी उल्हासे थोर । भरत भेटलिया श्रीरघुवीर । आनंदातें पावला ॥३॥ अरुणानुजें[1] अमरावतिये । अमृतहरणीं पावला जय । तेणें वंदिली विनता माय । तैसा भरत भेटला ॥४॥ याउपरी काय वर्तलें । तें श्रोतीं पाहिजे परिसिलें । तेंचि आतां वक्तियां वहिलें । सांगों आदरिलें श्रीरामकथे ॥५॥

उभौ कुमारौ सौमित्रे तव धर्मविशारदौ । अंगदश्चंद्रकेतुश्च समर्थौ दृढधन्विनौ ॥१॥
इमौ राज्येऽभिषेक्ष्यामि देश: साधु विंधीयताम् । रमणीयो ह्यसंबाधो रमेतां यत्र धन्विनौ ॥२॥
न राज्ञां यत्र पीडा स्यान्न चैवाश्रमवासिनाम् । स देशो दृश्यतां सौम्य नापराध्यामहे यथा ॥३॥

लक्ष्मणपुत्रांना राज्य देण्याची रामांची सूचना : श्रीराम म्हणे ते काळीं । हे सुमित्रात्मज आतुर्बळी । धार्मिक सुशीलता आगळी । धनुर्विद्या पैं यांची ॥६॥ नामें अंगद चंद्रकेत । पितयासारिखा पुरुषार्थ । अति समर्थ बळवंत । दोघे अश्विनीकुमार जैसे ॥७॥ यांतें उत्तम देश पाहूनी । दोघे स्थापावे दों स्थानीं । माझे दृष्टीपुढें अभिषिंचूनी । राज्य दोघां पैं द्यावें ॥८॥ उत्तम देश उत्तमस्थानीं । भरत लक्ष्मण हो स्थापा दोनी । जेथें सुभिक्षं[2] सुकाळ अनुदिनीं । ज्या प्रांतीं मुनि सिद्ध असती ॥९॥ ऐसें उत्तम राष्ट्र पाहोन । तेथें स्थापावे सौमित्रनंदन । ऐसें बोलिला श्रीरघुनंदन । तें भरतें परिसिलें हो ॥१०॥ हो जी म्हणोनि दयाळा । कैकेयीकुमर तये वेळां । बोलता झाला तया काळा । तें परिसावें सावधानें ॥११॥

तथोक्तवति रामे तु भरत: प्रत्युवाच ह । अयं कारुपथोद्देशो रमणीयो निरामय: ॥४॥
निवेश्यतां तत्र पुरमंगदस्य महात्मन: । चंद्रकेतोश्च सुचिरं चंद्रकांतं निरामयम् ॥५॥
तद्वाक्यं भरतेनोक्तं प्रतिजग्राह राघव: । तं च कृत्वा वशे देशमंगदस्य न्यवेशयत् ॥६॥
अंगदीया पुरी रम्यां ह्यंगदस्य निवेशिता । रमणीया सुगुप्ता च रामेणाक्लिष्टकर्मणा ॥७॥
चंद्रकेतोश्च मल्लस्य मल्लभूम्यां निवेशिता । चंद्रकांतेति विख्याता दिव्या स्वर्गपुरी यथा ॥८॥

अंगदपुरी व चंद्रावतीची स्थापना : ऐसें श्रीराम बोलिल्यावरी । भरत म्हणे तें अवसरीं । उत्तम देश उत्तरेच्या पारीं । विचारिलासें[3] राजेंद्रा ॥१२॥ उत्तरदेशाचे ठायीं । पुण्यस्थळें बहुविध पाहीं । हरिद्वार कुरुक्षेत्र इतरही । तीर्थे वसती श्रीरामा ॥१३॥ ज्वालामुखी नगरकोट । चीन महाचीन भोट । आणि मानससरोवराचें तट । समीप असे राजेंद्रा ॥१४॥ तया देशाचे

---

शब्दार्थ - १. गरुड, २. सुकाळ, ३. योजिला.

ठायीं । उत्तम नदी गंगादि । आणिकही शरयू मंदाकिनीही । तेचि प्रांतीं आहेत जी ॥१५॥ तेथें स्थापावा अंगदकुमर । त्याचेनि नामें वसवूं नगर । हे एकोनि श्रीरघुवीर । म्हणे भलें विचारिलें भरता तुवां ॥१६॥ जें भरता तुवां विचारिलें चित्तीं । तेंचि करीं मांडवीपती[1] । अंगदपुत्रातें अंगदपुरीप्रती । अभिषिंचून स्थापावें ॥१७॥ चंद्रकेत ऊर्मिलाकुमर[2] । जो कां बलाढ्य महावीर । चंद्रावती नामें नगर । वसवोनि त्यातें राज्य द्यावें ॥१८॥ चंद्रावतीनामें नगरी । वसवीं जैसी अमरपुरी । ऐसी आज्ञा भरतें शिरीं । सौमित्रासहित वंदिली ॥१९॥ दोघां पुत्रां अभिषिंचून । सवें घेवोनि अनेक सैन्य । अंगद पुढारां करून । लक्ष्मण वीर निघाला ॥२०॥ चंद्रकेतूसी धरोनि करीं । भरत निघे ते अवसरीं । चंद्रावतीनामें पुरी । उत्तरदिशे वसविली ॥२१॥ तेथें स्थापोनि चंद्रकेत । वर्षपर्यंत राहिला भरत । राजे करोनि आज्ञांकित । सुनिश्चित राज्य केलें ॥२२॥ सबळ देखोनि चंद्रकेत । श्रीरामभेटी निघाला भरत । अभिषिक्त सुमित्रासुत । तेथें स्थापिता झाला ॥२३॥ अंगद नामें वसवोनि पुर । तेथे स्थापिला अंगद वीर । लक्ष्मण राहोनि एक संवत्सर । पुत्राचिया पैं राज्यीं ॥२४॥ अंगद देखोनि प्रतापें पुरा । संतोष झाला लक्ष्मणवीरा । तेथोनि चालिला श्रीरघुवीरा । भेटावयाकारणें ॥२५॥ लक्ष्मण भेटला श्रीरामासी । निरूपिलें सर्व वृत्तांतासी । सवेंचि भरतें अग्रजासी । येवोनियां नमस्कारिलें ॥२६॥ जाणविला सर्व वृत्तांत । ऐकोनि तोषला श्रीरघुनाथ । दोघां बंधूंसी आलिंगित । उल्हास चित्तीं न समाये ॥२७॥ भरत आणि लक्ष्मण । श्रीरामसेवें सुखसंपन्न । असतां कित्येक वर्षे क्रमोन । बहुकाळ लोटला ॥२८॥ चौघे बंधु अति प्रीतीं । स्वधर्मे करती राजनीती । अधर्म द्वंद्व देशाप्रती । जन नेणती स्वप्नींही ॥२९॥ घरोघरी नित्य नवा सोहळा । दरिद्र नेणती कोण काळा । सुखस्वानंद लोकां सकळां । राज्यीं असतां श्रीराम ॥३०॥

ततः काले तु कस्मिंश्चिद्रामे धर्पमरे स्थिते । कालस्तापसरूपेण रामं द्रष्टुमुपागतः ॥९॥
सोऽब्रवील्लक्ष्मणं वाक्यं धृतिमंतं मनस्विनम् । निवेदयस्व रामाय संप्राप्तं कार्यगौरवात् ॥१०॥
दूतो ह्यतिबलस्याहं महर्षेरमितौजसः । दिदृक्षुरागतो रामं त्वरितं मां निवेदय ॥११॥
तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिस्त्वरयान्वितः । आचचक्षे स रामाय तं संप्राप्तं तपोधनम् ॥१२॥

रामदर्शनार्थ दूताचे आगमन : श्रीराम स्वधर्मस्थिती । रत असतां द्वारीं लक्ष्मणाप्रती । दूत येवोनि निजस्थिती । सांगता झाला ते समयीं ॥३१॥ श्रीरामदर्शनालागून । येथें झालें माझें आगमन । आणिक असे कार्याकारण । मी बळवान पैं आलों ॥३२॥ मी तापसी बुद्धिमंत । श्रीरामभेटीचें परम आर्त । लक्ष्मणा जाणवावी मात । श्रीरघूत्तमरायासी ॥३३॥ मी आलों असे कार्यार्थी । लक्ष्मणा जाण निश्चितीं । मात जाणवीं श्रीरघुपती । जेथें असेल तेथें जाईं ॥३४॥ ऐसें मुनीचेनि मुखानिळें[3] । वचन परिसोनि सुमित्राबाळें । शीघ्रवत चालिला जेथें भूपाळें । श्रीरामचंद्रें असिजे ॥३५॥ प्रणिपात करोनि श्रीरघुपतीसी । जाणविले सर्व वृत्तांतासी । द्वारीं दूत तुमचे भेटीसी । तिष्ठतसे राजेंद्रा ॥३६॥ धरोनियां मुनीचा वेष । द्वारीं तिष्ठतसे तापस । तुमच्या दर्शनाची आस । पहातसे श्रीरामा ॥३७॥ सौमित्र ऐसें बोलिल्यावरी । ऐकोनि श्रीराम आज्ञा करी । म्हणे जावोनि झडकरी । दूत पाचारीं भेटीसी ॥३८॥ अग्रमुखींचें होता वचन । परिसोनि सुमित्रानंदन । वेगीं द्वारासी येऊन । भीतरीं दूतासि पैं नेलें ॥३९॥

---

शब्दार्थ – १. हे भरता ! २. लक्ष्मणाची स्त्री, ३. तोंडून (अनिल=वायू)

तेजसा तपसा चैव ज्वलंतमिव पावकम् । सोऽभिगम्य नरश्रेष्ठं दीप्यमानं स्वतेजसा ॥१३॥

तो दूत म्हणजे साक्षात काळच होता : तो दूत म्हणाला कैसा । कीं तेजाचा सूर्य जैसा । कीं तापसांमाजी सहसा । अग्नीसारिखा भासतसे ॥४०॥ आपुलिया प्रभेकरून । पुढें न्यून झाला तपन[1] । ऐसा श्रीरामासंमुख येऊन । श्रीरामें देखिलें तयातें ॥४१॥ परस्परें देवोनि आलिंगन । कुशल उभयतां पुसोन । श्रीराम करिता झाला प्रश्न । कोठोनि येणें मुनिराजा ॥४२॥ कोणे कार्यालागूनि मुनी । आलेति मज कृपा करोनी । जीवींचें सांगावें वचनीं । आलेति कोठोनि द्विजवर्या ॥४३॥ मृदु मंजुळ श्रीरामवाणी । परिसोनि बोलता झाला मुनी । म्हणे राया ज्या कार्यालागूनी । आलों असें महापुरुषा ॥४४॥ तें गुह्य आहे कथन । एकांतीं करावें श्रवण । ऐसें ऐकोनि रघुनंदन । सौमित्रा आज्ञापिता जाहला ॥४५॥

द्वारे तिष्ठ महाबाहो प्रतिहारं विसर्जय । स मे वध्य: खलु भवेद्वाच्यं वां शृणुयाच्च य: ॥१४॥

द्वाररक्षक म्हणून लक्ष्मणाची योजना : द्वारीं बैसोनि लक्ष्मणा । पुरुषांमाजी पंचानना । द्वारपाळां आज्ञापोनि सुजाणा । आपण तेथें बैसावें ॥४६॥ भीतरीं न येवों द्यावें कोणी । आपण सावध बैसोनी । जंवपर्यंत हा मुनी । मजसीं संवाद करितसे ॥४७॥ मुनीची आज्ञा संवादकथा । एकांतीं बैसोनि करूं वार्ता । तंवपर्यंत सुमित्रासुता । कोणा भीतरीं येवों नेदीं ॥४८॥ द्वारीं बैसवोनि लक्ष्मण । मुनि आणि श्रीरघुनंदन । कथिते झाले पूर्वकथन । सावधानेंकरोनी ॥४९॥

शृणु राजन्यथा सत्यं यदर्थमहमागत: । अहं हि पूर्वके भावे पुत्रस्तव परंतप ।
पितामहेन देवेन प्रेषितोऽस्मि तवांतिकम् ॥१५॥

अहं हि पूर्वके भावो पुत्रस्तव: परंतप । मायासंभावितो वीर: काल: सर्वहर: पर: ॥१६॥

पितामहस्त्वां भगवानाह लोकपति: प्रभु: । समर्थस्ते महाराज लोकान्स परिरक्षितुम् ॥१७॥

काळाने ब्रह्मदेवाचा संदेश रामांना सांगितला : सौमित्र बैसोनि महाद्वारीं । श्रीराम आणि मुनि भीतरीं । विचार करिते झाले ते अवसरीं । शैलारि[2] गुरूसीं[3] जैसा ॥५०॥ काळपुरुष म्हणे राजचूडामणी । मी आलों ज्या कार्यालागूनी । तें सत्य जाणा आपुलें मनीं । विचारोनी विवेकें ॥५१॥ त्रैलोक्यपिता चतुरानन[4] । मज पाठविलें तेणें जाण । तुजपासीं तद्वचन । निवेदीन राजेंद्रा ॥५२॥ पूर्वीं मी तुझा पुत्र । महाराजा जाण सत्य । माझा पराक्रम अद्भुत । सावचित्त अवधारीं ।५३॥ काळ ऐसें माझें अभिधान । तूं काळात्मा जाण सनातन । काळानुसारें जैं प्राणिजन । तयांचा संहारकर्ता मी असें ॥५४॥ मी सूर्याचा निजकुमर । तूं सूर्यवंशींचा नृपवर । आणि सकळ सृष्टीचा ईश्वर । सर्जन[5] पाळण संहार तूं कर्ता ॥५४॥ पितामह जो विधाता । तुज पूजितो श्रीरघुनाथा । आणि देवगुरुजी समर्था । ध्येय तूं म्हणोनियां ॥५६॥ ब्रह्मादिकांचा जो ईश । तो तूं श्रीराम परमपुरुष । तुझिये मायेचा विलास । अनंत ब्रह्मांडें घडीमोडी ॥५७॥ जैसा ऊर्णाचा[6] सूक्ष्मतंत । तया क्रीडे स्वेच्छभूत । खेळ सरलिया ग्रासित । तंतूतें पैं जैसा ॥५८॥ तैसा तुझे मायेची अपूर्वता । ब्रह्मांडादि रची भूतां । संहारकाळीं समर्था । तुजमाजी सामावे जग ॥५९॥ जैसा रवि जीमूतद्वारें । वार्षिकीं अपार वर्षे नीरें । ग्रीष्मीं शोषी किरणें थोरें । पसरोनियां पृथ्वीवरी ॥६०॥ तैसा अनंत ब्रह्मांडांचा ईश्वर । लीलेनें धरिला रामावतार । फेडोनियां पृथ्वीचा भार । रावणादिक वधोनी ॥६१॥ यापूर्वीं मधकैटभासुर । शुंभ निशुंभ कोल्हासुर । लवणासुरादि थोर थोर । मारोनि सुर सुखी केलें ॥६२॥ अकरा सहस्र वर्षेपर्यंत । राज्य केलें स्वस्थचित्त । आतां समयीं वाट पाहत । स्वर्गी

---

शब्दार्थ – १. सूर्य, २. इंद्र, ३. बृहस्पतीशीं, ४. ब्रह्मदेव, ५. उत्पत्ती, ६. कोळ्याचा.

देव असती जी ॥६३॥ तुमच्या दर्शनाची उत्कंठा । थोर लागली नीळकंठा । चतुर्मुख जो स्रष्टा[1] । तोही वाट पाहतसे ॥६४॥ इंद्रादि देव सुरगण । सिद्ध गंधर्व विद्याधर चारण । समस्त सुर मिळोन । विवंचना करिती भेटीची ॥६५॥ जरी राज्याची इच्छा असेल मनीं । तरी सुखें रहावें कोदंडपाणी । स्वर्गीचे देव तुजवांचोनी । शोभत नाहींत महाराजा ॥६६॥ हा काळपर्यंत राजेश्वरा । हे पतिपाळिली वसुंधरा[2]। आता स्वर्गी येवोनि किंकरां । निजदासातें तारावें ॥६७॥ सुरवरांच्या कार्यालागून । तुझे येथें झालें आगमन । ऐसें बोलोनि चतुरानन । विवंचन करीतसे ॥६८॥

**ब्रह्मलोकी येण्याचे रामांचे काळाला आश्वासन :** ऐसें काळमुखींचें उत्तर । परिसोनियां श्रीरघुवीर । हास्य करोनियां स्थिर । दूतासि बोलता झाला ॥६९॥ श्रीराम म्हणे गा रविसुता[3] । पराक्रमिया गुणवंता। तुवां जावोनियां विधाता । बरवेपरी बोधावा ॥७०॥ त्वरित जावें ब्रह्मलोकासी । ऐसें वसे माझे मानसीं । किंचित कार्यकर्तव्यासी । करणें आहे मजलागीं ॥७१॥ तें कार्य संपोदोनि जाण । अवश्य स्वर्गासि येईन । मी देवांचा आज्ञाधारक पूर्ण । चित्तासारिखा वर्तें ॥७२॥

**रामदर्शनार्थ दुर्वासांचे आगमन, लक्ष्मणाचा प्रतिबंध, दुर्वास क्रोधाविष्ट :** तंव येरीकडे दुर्वासमुनी । महा द्वाराजवळी येऊनी । जेथें लक्ष्मण होता त्याप्रति वचनीं । बोलता झाला ते समयीं ॥७३॥ श्रीरामदर्शनालागून । सौमित्रा मी आलों जाण । वेगीं जाणीव जावोन । रघुनंदन जे स्थानीं ॥७४॥ दुर्वास एसें बोलिल्यावरी । लक्ष्मण म्हणे स्वामी क्षणभरी । स्थिर व्हावें रावणारी । भेटी येईल तुमचिये ॥७५॥ अवसर नाहीं श्रीरघुवीरा । एकांतीं करिती विचारा । तुम्ही बैसोनि क्षणैक धीर धरा । कृपा करा मजवरी ॥७६॥ एकांतीं श्रीराम आणि ऋषी । संवाद करितीं परस्परेंसीं । तेथें मज जातां कोप रामासी । क्षणामाजी येईल ॥७७॥ तुम्हीं नावेक स्वस्थ चित्त कीजे । उपरी भेटी देइजेल रघुराजें । ऐसे ऐकोनि अत्रितनुज[4] । लक्ष्मणासी क्रोधें वदे ॥७८॥

तं श्रुत्वा मुनिशार्दूल: क्रोधेन कलुषीकृत: । उवाच लक्ष्मणं वाक्यं निर्दहन्निव चक्षुषा ॥१८॥
अस्मिन्क्षणे तु सौमित्रे रामं मा दर्शयिष्यसि । विषयं च पुरं चैतद्दहिष्ये राघवं तथा ॥१९॥
भरतं वा च सौमित्रे युष्माकं चैव संततिम् ॥२०॥

लक्ष्मणाचें वचन परिसोनी । उद्विग्न झाला दुर्वासमुनी । क्रोधें थरथरां कांपे मेदिनी । भरतें आलें तमाचें ॥७९॥ नेत्र करोनि आरक्त । हातें हात असे घांसित । दंतें ओष्ठ चाचित । गात्रें कांपत सक्रोध ॥८०॥ ऐकें सुमित्रानंदना । येच क्षणीं भेटवीं श्रीरघुनंदना । नाहीं तरी अयोध्याभुवना । क्षणामाजि जाळीन ॥८१॥ तदनंतर श्रीरघुनाथ । जाळीन तुजहीसमवेत । आणिकही शत्रुघ्न भरत । हेही दाहीन निमिषार्धें ॥८२॥ करीन ब्रह्मांडाची होळी । सूर्यवंश मेळवीन धुळी । पुत्रपौत्रांसहित ये काळीं । भस्म करीन श्रीरामा ॥८३॥ ऐसें दुर्वास बोलिल्यावरी । लक्ष्मण दीर्घ चिंता करी । म्हणे मरण दोहींपरी । मजलागीं ओढवलें ॥८४॥ येरीकडे अग्निमहाप्रळय । उभा एकीकडे शार्दूळ । तैसे मज झालें केवळ । ऋषि कोपें उभा असे ॥८५॥ श्रीरामा न जाणवितां मात । ऋषि करील भस्मीभूत । सूर्यवंश होईल शांत[5] । ऐसा अनर्थ ओढवला ॥८६॥ गेलिया श्रीरामाजवळी । क्रोधें श्रीराम करील होळी । तरी मी एकलाचि महीतळीं । त्यागोनि स्वर्गा जाईन ॥८७॥ चुकलें सर्वांचें महाविघ्न । मी एकाकी पावेन मरण । ऐसा निश्चय करोनि नंदन । सुमित्रेचा निघाला ॥८८॥

शब्दार्थ – १. ब्रह्मदेव, २. पृथ्वी, ३. यमा, ४. दुर्वासऋषी, ५. नष्ट.

**लक्ष्मणाचे वृत्तनिवेदन व दुर्वासांचा सत्कार :** येवोनियां श्रीरामाजवळी । प्रणिपात करोनि बद्धांजळीं । जोडोनि कर ते काळीं । श्रीरामासि विनविता झाला ॥८९॥ लक्ष्मण म्हणे जी भूपाळा । द्वारीं दुर्वास तिष्ठत या काळा । तुमचे भेटी लागीं दयाळा । येवोनियां उभा असे ॥९०॥ अत्रिपुत्र दुर्वासमुनी । तिष्ठत दर्शनालागूनी । मज पाठविलें त्वरें करोनी । तुम्हां श्रुत करावया ॥९१॥ लक्ष्मण ऐसें बोलिल्यानंतरें । काळासि विसर्जोनि रघुवीरें । अर्घ्यपात्र घेवोनि करें । द्वाराजवळीं पैं आला ॥९२॥ ऋषीस श्रीरामा झाली भेटी । आनंद न समाये सृष्टीं । मग पूजा करोनि जगजेठी । ऋषि भवनासी आणिले ॥९३॥ देवोनियां वरासन[1] । श्रीराम करिता झाला विनवण । म्हणे स्वामी कृपा करून । कोणीकडे आलेती ॥९४॥ काय अपूर्व वाटलें चित्ता । म्हणोनि आलेति ऋषिसमर्था । तें आज्ञापिजे मज रघुनाथा । कृपा करोनि मुनिराया ॥९५॥ दाशरथीचें ऐसें उत्तर । अमृताहूनि अधिक मधुर । ऐकोनि दुर्वास ऋषीश्वर । संतोष थोर पावला ॥९६॥ म्हणे श्रीरघुनंदना । धन्य रविवंशीं कुळभूषणा । मी मार्गों आलों भोजना । क्षुधातुर हावोनी ॥९७॥ क्षुधा बाधीत मज भारी । ऐसे जाण तूं नृपकेसरी । तंव श्रीराम म्हणे स्नान झडकरी । सारोनि भोजन करावें ॥९८॥ झालासे मध्यान्हसमयो । मग स्नान करोनि महाबाहो । संध्या करोनि वैश्वदेवो । देवपूजा संपादिली ॥९९॥ पंक्ती दुर्वास बैसवोनी । भोजन सारिलें चौंघा जणीं । तांबूल देवोनि नाना आभरणीं । ऋषीश्वर पूजिला ॥१००॥ ऋषीश्वराचें झालें भोजन । वस्त्रें अलंकार भूषण । समर्पोनि श्रीरघुनंदनें । सुखासनीं बैसविला ॥१॥

**श्रीराम सचिंत :** अवतारसमाप्तीचें कथनचरित्र । आठवोनि श्रीरघुनाथ । मुनि आज्ञापोनि त्वरित । चिंतातुर पैं झाला ॥२॥ हीन दीन गेली कळा । हृदयीं बंधुवियोग आगळा । कांही न स्मरे तया वेळा । तेणें संतप्त मानस ॥३॥ जेवीं अमावास्येचें दिनीं । कळे तुटे चंद्र गगनीं । तैसा रामु शरासनपाणी[2] । निवांत राहिला ते समयीं ॥४॥ जेंवी ग्रीष्मऋतूच्या आगमनीं । सरिता शोषे आटे पाणी । तैसा श्रीराम चिंतातुर मनीं । अधोदृष्टी राहिला ॥५॥ ऐसा देखोनि श्रीरघुनाथ । पुढें उभा ठाकला सुमित्रासुत । बोलता झाला स्वामि किमर्थ । चिंतातुर तुम्ही असां ॥६॥ किमर्थ चिंतातुर तुम्ही । तेणें उद्विग्न होतो आम्ही । जो जो अवतार जे जे कामीं । तें तें कार्य संपादित ॥७॥ जेंवी बहुरूपी सोंग संपादी । हावभाव नाना विनोदीं । रंजवोनि जनांची मांदी । आपण वेगळा पैं असे ॥८॥ तैसा तूं योगियांचा ईश्वरू । त्रैलोक्याचा आदिगुरू । तूं कार्य कर्ता लीलावतारू । सुरकार्यालागीं वरिसी ॥९॥ घेवोनी मायेचें पांधरूण । दाविसी या लोकांलागून । परी तूं सत्य श्रीरघुनंदन । मायें खेद करितोसी ॥११०॥ सत्यप्रतिज्ञ म्हणवितां । अंतर पडलें या वचनार्था । ऐसें जाणोनि श्रीरघुनाथा । शंका चित्ता स्पर्शो नेदीं ॥११॥ प्रारब्धाधीन वर्ते प्राणी । तयाचें कर्तृत्व मिथ्या मानीं । आणि जें वदला वाल्मीकमुनी । तया वचना नुल्लंघीं ॥१२॥ जननीचिया जठरीं । जो जन्मला देहधारी[3] । तो काळाधीन वर्ते उपरी । कार्यकर्तृत्व त्या मायेचें ॥१३॥ यालागीं श्रीरामा । अवतारपुरुषा गुणधामा । आज्ञा देवोनी कांही आम्हां । कार्या निवेदन करावें ॥१४॥ मज स्वामी आज्ञा दीजे । प्रतिज्ञा आपुली सत्य कीजे। आपुले पूर्णपण प्रकटिजे । उद्वेगरहित होवोनी ॥१५॥

लक्ष्मणेनैवमुक्तस्तु रामः प्रचलितेंद्रियः । मंत्रिणः समुपानीय वसिष्ठं च पुरोहितम् ॥२१॥

---

शब्दार्थ – १. उच्च आसन, २. हाती धनुष्य असा, ३. प्राणी.

**वसिष्ठांना पाचारण :** ऐसें लक्ष्मण बोलिल्यावरी । ऐकोनि श्रीराम ते अवसरीं । चिंतातुर व्याकुळ भारी । अंग कांपें थरथरां ॥१६॥ नेत्रीं अश्रु लोटत । अंगीं बाष्प कंठ सद्गदित । बोलतां वाचा वळत । प्रधानांसी आज्ञा देता झाला ॥१७॥ अगा सुमंत प्रधाना । जावोनि श्रीगुरूच्या भवना[1]। निवेदावें माझिया वचना । श्रीरामचंद्रें बोलाविलें ॥१८॥ राघवाज्ञा वंदोनि शिरीं । सुमंतें जावोनि झडकरी । वसिष्ठासी नमस्कारोनी राजेश्वरीं । भेटीलागीं पाचारिलें सांगे ॥१९॥ प्रधान ऐसें बोलिल्यानंतरें । खुणे पावोनि ऋषीश्वरें । तत्काळ येवोनियां चतुरें । श्रीरामासि देखिलें ॥१२०॥ दाशरथी देखिला कैसा । दु:खाचा ओंतीव[2] मेरु जैसा । कां चिंतेचा चितारिला ठसा तैसा । नयनीं भासला ऋषिवर्या ॥२१॥ बाह्य देखिला ऐसिये दृष्टी । अंतरींची देखणी परिपाठी । श्रीरामें पूर्ण कोंदली सृष्टी । तेजें जगजेठी हेलावत ॥२२॥ बाह्य नेत्रीं अश्रूंचा पूर । अंतरीं आनंदाचा निर्भर । बाह्यबुद्धी वियोगशर । भेदले दिसती सर्वांगीं ॥२३॥ अंतरीं राम दिसे कर्ता । बाह्य दाखवी चरित्रा । ऐसें देखोनि वसिष्ठ चित्ता । आश्चर्यता वाटली ॥२४॥

**वसिष्ठांचा रामांना उपदेश :** वसिष्ठ म्हणे श्रीरघुनंदना । आठवीं आठवीं आपुली पूर्वप्रतिज्ञा । अवताराचे आर्धीची संज्ञा । विसरलासी दिसतसे ॥२५॥ संसार म्हणजे गंधर्वजाळ[3] । विचारितां दिसे मृगजळ । जैसें का वंध्येचें बाळ । काय कोठे भेटलें ॥२६॥ यदर्थीं एक ऐक कथा । सांगतो या संसारदृष्टांता । बागूलगृहीं गर्भिणी पोसितां । वंध्या नामें पैं होती ॥२७॥ तियेचे उदरीं जन्मला पुत्र । अतिलक्षणिक गुणवंत । पितयासारिखा पराक्रमी बहुत । दिवसेंदिवस वाढला ॥२८॥ शुक्तीच्या रजताचीं[4] भूषणें । गगनींची कमळमाळा तेणें । घालोनि गळां अति सत्राणें । जननीतें श्रमविलें ॥२९॥ घेवोनि मातेच्या आज्ञेतें । पारधी निघाला वनातें । तंव सशाचें शिंग तयातें । प्राप्त झालें श्रीरामा ।१३०॥ तेंचि शस्त्र घेवोनि करीं । पुढें येतां ते अवसरीं । मृगजळाचे सरोवरीं । पारधीलागून गुंतला ॥३१॥ ऊर्णतंतूचें जाळें घेवोनि करीं । रिघाला तया सरोवरीं । मीन धरोनि नानापरी । बाहेर येत पैं होता ॥३२॥ तंव तेथें झाले विपरीत । सुसरीनें गिळिला वांझेचा सुत । तयाचे जे पुत्रपौत्र । शुद्धी लागीं निघाले ॥३३॥ आले तया सरोवरासी । पुढे देखिलें दिगंबरआश्रमासी । शुद्धि[5] पुसते झाले त्यासी । एकोनि मुनि कोपला ॥३४॥ परस्परें झाला संग्राम । भिडते झाले क्रोधें परम । घायीं पडले पावोनि श्रम । गतप्राण पैं झाले ॥३५॥ तयांचे वांझेसि झालें दु:ख। रुदन करी दीर्घ शोक । तैसा हा संसार मायिक । काय सत्य मानिजे ॥३६॥ यालागीं जी रघुनाथा । बंधुवियोगाची न करीं चिंता । सत्यप्रतिज्ञ या वचनार्था । मान दीजे राजेंद्रा ॥३७॥ ऐकानि श्रीगुरूची गोष्टी श्रीरामा सुख झालें पोटीं । भ्रूलतासंकेतें[6] धूर्जटी[7] । लक्ष्मणासी आज्ञा देता झाला ॥३८॥

**आज्ञाभंग झाल्यामुळे रामांकडून लक्ष्मणाला देहांताची शिक्षा :** श्रीराम म्हणे लक्ष्मणा । वधायोग्य देखिलें अवगुणा । तरी वधूं नये बंधुजना । धर्म शास्त्र पैं असे ॥३९॥ माझी अवज्ञा करून । भीतरीं आलासि दुर्वास आला म्हणोन । ऐसिया अपराधातें द्यावा जी प्राण । मुख मज न दाखवीं ॥१४०॥ भ्रूलतासंज्ञेची जाणोनि खूण । काय करिता झाला लक्ष्मण । श्रीरामासी नमस्कारून । प्रदक्षिणा पैं केली ॥४१॥ नमन करोनि श्रीगुरूसी । आज्ञा पुसोनि समस्तांसी । येवोनि शरयूचे तीरासी । स्नानसंध्या सारिली ॥४२॥

---

**शब्दार्थ –** १. आश्रमाला, २. मूर्तिमंत, ३. मिथ्यामास, ४. रुप्याची, ५. शोध, ६. भिंवईच्या खुणेने, ७. योगी.

लक्ष्मणाचे देहविसर्जन व पाताळात प्रवेश : घालोनियां पद्मासन । हृदयीं धरोनि श्रीरघुनंदन । आकर्षोनी पंचप्राण । निजदेह विसर्जिला ॥४३॥ जैसें कवच सांडी भुजंग । कीं हंस त्यजी तडाग । तैसा सुमित्रेचा गर्भ लिंग- । देह त्यागितां पैं झाला ॥४४॥ सौमित्र त्यजी निजदेहो । गेला पाताळासी पहा हो । तेथें कद्रुसुतांचा[1] समुदावो । तया लोका पावला ॥४५॥ लक्ष्मण केवळ शेषावतार । श्रीरामाच्या कार्या तत्पर । होवोनियां लीला थोर । समस्तांसी दाविली ॥४६॥ जैसी स्वामीची आज्ञा लाहोनी[2] । भृत्य प्रवेशे निजभवनीं । तैसा सौमित्र निजस्थानीं । श्रीरामवचनें पैं गेला ॥४७॥ एका जनार्दना शरण । पाताळीं प्रवेशला लक्ष्मण । पुढील अवतारसमाप्तीचें कथन । सादर श्रवण करावें ॥४८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां लक्ष्मणपातालगमनं नाम पंचसप्ततितमोऽध्यायः ॥७५॥ ओंव्या ॥१४८॥ श्लोक ॥२१॥ एवं ॥१६९॥

## अध्याय शहात्तरावा

॥ श्रीविश्वजीवनाय नमः ॥

### श्रीरामांचे शरयू नदीवर आगमन

विसृज्य लक्ष्मणं रामस्तीव्रशोकसमन्वितः । वसिष्ठं मंत्रिणं चैव नैगमांश्चेदमब्रवीत् ॥१॥
अद्य राज्येऽभिषेक्ष्यामि भरतं भ्रातृवत्सलम् । अयोध्यायाः पतिं वीरं ततो यास्याम्यहं वनम् ॥२॥

लक्ष्मणाविषयी रामांचा शोकावेग : लक्ष्मणें सांडोनि इहलोक । पाताळ सेविता झाला देख । तें देखोनि रघुनायक । शोकार्णवीं बुडाला ॥१॥ श्रीराम म्हणे लक्ष्मणा । मज सांडोनि गेलासी गुणनिधाना । काय अपराध देखोनी मना- । माजी निष्ठुर झालासी ॥२॥ लक्ष्मणा काय मी चुकलों । कोण अपराध आचरलों । किंवा निष्ठुर बोलिलों । म्हणोनि रुसलासी सौमित्रा ॥३॥ मजबरोबरी वनांतरीं । हिंडतां श्रमलासी बा भारी । द्वादश वर्षे निराहारी । अन्न उदक त्यजियेलें ॥४॥ म्हणोनि कोपलसी वेल्हाळा[3] । सुमित्रेच्या लघु बाळा । आतां मुख दाखवीं एक वेळा । मज दुःखितां देखोनी ॥५॥ जैं शक्ति घातली रावणें । तैं दुखाविलासी निजप्राणें । तो राग धरोनियां मनें । मज त्यागून गेलासी ॥६॥ आतां काय करूं बंधुराया । माझ्या जीवींच्या विसाव्या । मज एकलें सांडोनियां । केउता गेलासी वनवासा ॥७॥ जानकीनें पंचवटिकेसीं । छळिलें म्हणोनि कोपलासी । यालागीं निष्ठुर झालासी । मजवरी बंधुराया ॥८॥ तुवां इंद्रजित मारिला । त्रैलोक्यासी आनंद झाला । तो तूं रागें सांडोनि मजला । देह त्यागून गेलासी ॥९॥ ऐसी श्रीरामाची करुणवाणी । तेणें दुःखें फुटे अवनी । पक्षी चारा न घेती नयनीं । अश्रूंचे पूर लोटलें ॥१०॥ स्तब्ध अयोध्येचे जन । स्तब्ध सेना सैनिक प्रधान । कोणा कांही न स्मरे जाण । लक्ष्मणवियोगास्तव ॥११॥

भरताला राज्याभिषेक करून आपण देहत्याग करावा असा रामांचा निश्चय, भरताचा विलाप : श्रीराम म्हणे गुरूसी । आणि मंत्रियां समस्तांसी । आजी अभिषेक भरतासी । अयोध्येचा पैं कीजे ॥१२॥ भरता राज्यीं बैसवीन । मीही करीन येथून गमन । जेणें मार्गें लक्ष्मण । गेला असेल ते ठायीं ॥१३॥ लक्ष्मणावांचोनी माझे प्राण । सर्वथा न राहती निश्चयें जाण । ऐसें ऐकोनी सभाजन । भरतेंसीं मूर्च्छागत झाले ॥१४॥ मूर्च्छित झाले सभालोक । मूर्च्छित भरत झाला

---

शब्दार्थ – १. सर्पांचा, २. संपादून, ३. हे सुंदरा.

देख । त्याउपरी सावधान नावेक । होवोनि ठेला ते समयीं ॥१५॥ भरत म्हणे श्रीरामा । राज्यीं चाड नाहीं आम्हां । तुजमागें संसारधर्मा । पडे तो जाण आत्मघाती ॥१६॥ तुजवीण विषयभोग । तोचि प्राणियासी क्षयरोग । जे तुजसीं विमुख करिती भोग । तोचि रोग तयांसी ॥१७॥ तुज त्यागोनि राज्य करणें । हेंचि मूळ नरका जाणें । वेगळें मार्गे राहणें । उबगवाणें[1] संसारीं ॥१८॥ तुझिये चरणाचे प्राप्ती-कारणें योगी योग साधिती। त्या तुज त्यागून श्रीरघुपती। कोण अभागी राहील ॥१९॥ लक्ष्मणामागें तूं जासी। आम्ही त्यागूं निजप्राणांसी। नाहीं तरी आपुले कांसेसी । लावोनियां सवें न्यावें ॥२०॥ तूं लक्ष्मणवियोगें झालासी दीन। उभयतांचें वियोगें प्राण । न राहती श्रीरामा सत्य जाण । न सोडूं जाण तुजलागीं ॥२१॥ जिकडे तूं करसी गमन । तिकडे आम्ही येऊं जाण । आम्हां राज्याची चाड कोण । तुजवेगळें सर्व नैश्वर्य[2] ॥२२॥ ऐसा भरताचा निश्चय । जाणिता झाला जानकीप्रिय । आणि नगरजनांचें हृदय । कळों सरलें राजेंद्रा ॥२३॥ भरत म्हणे श्रीरामा जाण । तूं जरी स्वर्गा करिसी गमन । तरी आम्ही तेथें करूं प्रयाण । निश्चय पूर्ण जाणावा ॥२४॥ हे लहु कुश दोघे कुमर । अभिषिंचोनि करावे राज्यधर । कोलनामें वसवोनि नगर । तेथें कुश स्थापावा ॥२५॥ उत्तरे स्थापावा लहु कुमर । जो युद्धीं परम शूर । अरिरायावरी[3] तोडर । जेणें बांधिला बिरूदेंशीं[4] ॥२६॥

शत्रुघ्नाला भेटीस पाचारण : ऐसें भरत बोलिल्यावरी । दूत पाचारिला रामे ते अवसरीं । म्हणे तूं जाय मधुपुरीं । शत्रुघ्नासी भेटावें ॥२७॥ आमुचें महाप्रस्थान । करितों स्वर्गाप्रति गमन । तरी ऐसें समस्त निवेदोन । आणीं शत्रुघ्न भेटीसी ॥२८॥ ऐसें श्रीरामें निवेदिल्यावरी । दूत आज्ञा वंदोनि शरीं । नमस्कारोनि दूषणारी । शीघ्रवत निघाला ॥२९॥ मनीं धरोनि श्रीराम-वचन । दूत मधुपुरा करितां गमन । मागें काय वर्तले तें सावधान । श्रवण कीजे श्रोते हो ॥३०॥ श्रीरामाचें गमनकार्य । हें ऐकोनि जनसमुदाय । मूर्च्छित झाले राजे आणि ऋषिवर्य । थोर दुःख पावले ॥३१॥

नागरिकांची रामांसह सहगमनाची तयारी. लव व कुश यांना राज्याभिषेक : प्रधान म्हणती श्रीरघुनाथा । ऐकें नगरींच्या जनांची कथा । म्हणती श्रीराम स्वर्गा जातां । आमुचें राहून कोण कार्य ॥३२॥ श्रीरामामार्गे अयोध्यापुरी- । माजी वसेल तो दुराचारी । ऐसा निश्चय रावणारी । थोरथोरीं केला असे ॥३३॥ तुवां येथें प्रतिपाळिले । प्रतापेंकरोनि रक्षिलें । कृपादृष्टीनें अवलोकिले । अयोध्यावासी जन सर्व ॥३४॥ ते अयोध्येसी रामेंवीण । सर्वथा आम्ही न राहूं जाण । ऐसे समस्त नगरीचें जन । निश्चय करोन राहिले ॥३५॥ ऐसी श्रीरामें प्रधानमुखींची गोष्टी । ऐकोनियां सुखसंतुष्टीं । निश्चय जाणोनियां पोटीं । भरतासी बोलता झाला ॥३६॥ श्रीराम म्हणे राया भरता । धर्मवंता उदारचित्ता । कुश लहु अभिषिंचोनि शीघ्रता । विलंब सर्वथा करूं नको ॥३७॥ यज्ञशेष करितां भोजन । कैकेयी मातेसी झालें विघ्न । तैसा समय ओढवला जाण । व्यवधान[5] न साहे ॥३८॥ ऐसें श्रीराममुखींचें वचन । भरतें माथां वंदोनि जाण । तत्काळ पुत्रां अभिषिंचून । राज्य देता पैं झाला ॥३९॥ कुश उत्तरे कोशलेप्रती । जे कां विंध्यशैलाचिये प्रांतीं । कुशवती नामें त्रिजगतीं । विख्यात असे प्रसिद्ध ॥४०॥ लहुवाकारणें रम्य जाण । श्रीवतीनामें प्रसिद्ध पूर्ण । तेथें स्थापिला देवोनि सैन्य । अगणित धन दीधलें ॥४१॥ ऐसे दोघे कुमर । श्रीरामें केले राज्यधर । सैनिकसेनापरिवार । प्रधान चतुर सवें देउनी ॥४२॥ येरीकडे तो निघाला दूत । मार्गी क्रमोनि त्रिरात्र । पुढें प्रवेशला शत्रुघ्न

---

शब्दार्थ - १. दुःखकारक, २. अश्वशात, ३. शत्रूवर जय, ४. कीर्तिपूर्वक, ५. विलंब.

जेथ । राज्य करीत मधुपुरीचें ॥४३॥ दूत मधुपुरीं प्रवेशला । शत्रुघ्नरायासी भेटला । वृत्तांत अवघा जाणविला । श्रीरामाचा परियेसा ॥४४॥

दूताकडून वृत्त कळताच शत्रुघ्नाने राज्य मुलांना देऊन तो अयोध्येला आला : ऐकोनि शत्रुघ्न ते समयीं । परम दु:खित झाला पाहीं । म्हणे विधातिया[1] तुवां काहीं । निर्माण केलें चरित्र हें ॥४५॥ म्हणे कुळक्षयो आरंभिला । सूर्यवंशा अंत झाला । रामावतार संपला । मज ऐसें वाटतें ॥४६॥ कीं अवधि[2] पुरली अयोध्येची । कीं ध्यान सिद्धी संपली शिवाची । कीं कुळवल्ली रविवंशाची । निदानफळा पैं आली ॥४७॥ कीं जनांचें अभाग्य जाणोन । श्रीराम करिता झाला गमन । कीं स्वर्गींच्या देवां उत्कंठा दारुण । श्रीरामदर्शनालागूनी ॥४८॥ कीं लक्ष्मणजानकीवियोगें । श्रीराम श्रमला दु:खमार्गें। म्हणोनि स्वर्गा जाणें प्रसंगें । ओढवलें श्रीरामा ॥४९॥ कीं अभक्ति बंधूंची देखिली । म्हणोनि श्रीरामें अयोध्या त्यागिली । कीं अयोध्येचें जनीं अभिशापिली । जानकी ते निदानें ॥५०॥ ऐसें जाणोनि श्रीरघुनाथ । स्वर्गाप्रति असे जात । तरी आपुला निश्चयहेत । श्रीराममदर्शना पैं जावें ॥५१॥ ऐसें शत्रुघ्नें भावोनि[3] मानसीं । वांटा केला निजराज्यासी । दों ठायीं दों पुत्रांसी । राज्य देता पैं झाला ॥५२॥ सुबाहुनामें ज्येष्ठ सुत । तया मधुपुराचें राज्य देत । वैदेशीं कनिष्ठ सुत । शत्रुहंती स्थापिला ॥५३॥ शत्रुहंती आणि सुबाहु । दों ठायीं स्थापिले दोघे भाऊ । धनधान्य परिवार देवोनि बहु । प्रजापाळणीं ठेविलें ॥५४॥ आपण आरूढोनि दिव्यरथीं । रथ प्रेरिला शीघ्रगतीं । येवोनियां तीन रातीं । अयोध्येप्रती प्रवेशला ॥५५॥ आला श्रीरामभवना उजु । पुढें देखिला रघुराजु । अतिदिव्य तेज:पुंजु । पीतांबरधारी बैसला ॥५६॥ घालोनियां पद्मासन । परिवेष्टित मुनिगण । ऐसा देखोनि रघुनंदन । साष्टांग नमन पैं केलें ॥५७॥ कर जोडोनि शत्रुघ्न । करिता झाला निजराज्यकथन । म्हणे स्वामी दोघे नंदन । राज्य देवोन स्थापिले ॥५८॥ तुमचा महाप्रयाणसमय । ऐकोनि वाटलें आश्चर्य । माझा ऐसा असे निश्चय । तुम्हां बरोबरी सेवेसि यावें ॥५९॥ सदासर्वदा निशिदिन । न विसंबावे[4] तुझे चरण । अखंड वाचे नामस्मरण । करीत कीर्तन असावें ॥६०॥

प्रयाणसमयी सर्व रामभक्तांचे आगमन : ऐसें बोलतां लवणारी । तंव वानर ऋक्ष ते अवसरीं । येते झालें त्रिशिरारि[5]- । प्रयाणकाल देखोनि ॥६१॥ आले लंकावासी निशाचर । आले देशोदेशींचें वानर । देव गंधर्व विद्याधर । सुर किन्नर पैं आले ॥६२॥ श्रीरामाचें महाप्रयाण । जाणोनियां राष्ट्रीचे जन । येते झाले परिवारून । कुटुंबेंसीं ते काळीं ॥६३॥ वानर म्हणती श्रीरघुराजा । प्रयाणसमयो हा तुझा । होतो म्हणोनि वानरफौजा । निजदर्शना पैं आल्या ॥६४॥ तुमचें स्वर्गांप्रति गमन । ऐसें वानरीं ऐकोन । आणि राक्षसेंसीं बिभीषण । भेटी घ्यावया आलासे ॥६५॥ ऐकोनि वानरांची वाणी । बोलता झाला कोदंडपाणी । म्हणे बिभीषणा तुजलागोनी । एक कारण सांगतों ॥६६॥

बिभीषण व मारुतीला चिरंजीवित्वाचा वर, इतरांची पात्रतेनुसार संभावना : प्रजापाळण करावें । श्रीरामस्मरण असों द्यावें । चिरंजीव होवोनि रहावें । चंद्रसूर्यपर्यंत ॥६७॥ रविशशी जंववरी गगनीं । विचरती मेरुप्रदक्षिणेलागूनी । तंवपर्यंत राजधानी । लंके राज्य करावें ॥६८॥ बिभीषणासी देवोनि वर । मस्तकीं ठेविला अभयकर । मग पाचारिला कुमर । अंजनीचा परियेसा ॥६९॥ श्रीराम म्हणे गा हनुमंता । तू आमुचा प्राणदाता । उपकार तुझे आठवितां ।

शब्दार्थ - १. हे ब्रह्मदेवा, २. शेवट, ३. योजून, ४. सोडावें, ५. राम:

न गणवती असंख्य ॥७०॥ तुवां रहावें या लोकीं जाण । जंवपर्यंत जीव धरिती प्राण । तंव करी कथाश्रवण । रामायण अनुपम्य ॥७१॥ तूं वज्रदेही चिरंजीवी । राहें स्वरूपीं अनुभवनी । काळक्रमणा ऐसी करावी । मम आज्ञेकरोनी ॥७२॥ ऐसा मारुतीस देवोनि वर । मग पाचारिला मैंद वापर । तया अमृत पाजोनि अपार । अमर केला रघुराजें ॥७३॥ अमर होवोनि मैंदें रहावें । स्वेच्छा पृथ्वी विचरावें । माझ्या पुत्रां प्रतिपाळावें । कृपा करोनि वानरा ॥७४॥ जांबवंतासी म्हणे श्रीरघुपती । तुमची पुढें पुरवीन आर्ती । मग पाचारिला कपिपती । वानरांचा निजस्वामी ॥७५॥ सुग्रीवासी म्हणे रघुराज । तुझा अंगद जो कां आत्मज[१] । तयासहित करीं राज्य । किष्किंधेचें निजबळें ॥७६॥ उर्वरित वानर बोलाविले । आज्ञा देवोनि पाठविलें । मग वसिष्ठासी विनविलें । अग्निहोत्र सिद्ध कीजे ॥७७॥

**महाप्रयाणाची सिद्धता :** वसिष्ठें करोनि अग्निहोत्र सिद्ध । प्रज्वळिला जातवेद[२] । यज्ञपात्रांसहित शुद्ध । पुढें केला श्रीरामाज्ञेनें ॥७८॥ श्रीरामें करोनि संध्यास्नान । ब्रह्मचर्यव्रत अवलंबून । हातीं कुश विभूति लावोन । दिव्य वस्त्रें नेसला ॥७९॥ यज्ञोपवीत कंठीं उत्तरीं । बैसोनियां उत्तमासनावरी । नाहीं मोह माया शरीरीं । पुत्रपौत्रराज्याची ॥८०॥ नाहीं ममता राज्याचा मान । नाहीं कर्मठता अभिमान । जैसा शरत्काळींचा[३] चंद्र जाण । निजतेजें शोभतसे ॥८१॥ ऐसा निष्कर्म तो रघुपती । आसन घालोनि स्वर्गगमनार्थीं । दक्षिणांगीं बैसवोनि शक्ती । कनकमय योषिता ॥८२॥ जवळी ठेवोनि शस्त्रसंभार । धनुर्ष्ये रत्नजडित अपार । पुढें करोनि ॐकार वषट्कार । आणि थोर थोर ऋषिमंडळी ॥८३॥

**रामांसह प्रयाण करण्यासाठी सर्वांचे आगमन :** द्वारी उभे द्विजवर । सवें स्त्रिया कन्या कुमर । वृद्ध तापसी दिगंबर । गमनालागीं उद्यत[४] ॥८४॥ पंडित जोशी वेव्हारे । वेदपाठक अग्निहोत्री सपरिवारें । चाटे[५] सोवनी शिंपी रंगारे । सोनार सुतार रजक पैं ॥८५॥ नापित कुलाल साळी । भुसारी वाणी तांबोळी । मणियार रथकार तेली । आणि गवळी निघाले ॥८६॥ माहार डोहर चर्मक । कोळी भिल्ल नाळिक । इतर जातींचेही लोक । श्रीरामसंगें निघाले ॥८७॥ कांसार लोहार धनुर्धर । योगी तापसी मुनीश्वर । सपत्नीक अपत्नीक विधुर । लहान थोर निघाले ॥८८॥ कोणा नाहीं मागिला मोहो । कोणी कोणाचा न धरी स्नेहो । कोणी कोणी न पुसती पहा हो । श्रीरामासंगें निघाले ॥८९॥ कोणा नाही कुटुंबाची चिंता । कोणा नाहीं दरिद्रता । कोणा नाहीं कामकामता । श्रीरामाचे गमनीं हो ॥९०॥ हृष्ट पुष्ट नगरींचे जन । कोणा नाहीं दुःख दैन्य । ऐसें देखोनि भरत शत्रुघ्न । श्रीराम मात जाणविली ॥९१॥ भरत म्हणे श्रीरामचंद्रा । योगिमानसमोहन गुणसमुद्रा । पुत्रस्त्रियांसहित नरेंद्रा । अयोध्याजन द्वारीं आले ॥९२॥ तुम्हांसवें करावें गमन । म्हणोनि उभे द्वारीं जन । आनंदें निर्भर[६] होवोन । तुमचा संग इच्छिती ॥९३॥ स्वर्गगमनाकारणें । लोक बैसले धरोनि धरणें । तरी कृपा करोनि राजीवनयनें । या समस्तांसि पैं न्यावें ॥९४॥ हे चराचर जीव अवघे । कृपाळुवें सवें न्यावे । ऐसें ऐकोनि श्रीराघवें । नगरासहित निघता झाला ॥९५॥ अयोध्या सांडोनि अर्ध योजन । शरयूतीरीं केलें प्रस्थान । एका विजयी जनार्दन । सावधान अवधारा ॥९६॥ पुढिले प्रसंगीं चतुरानन । श्रीरामास सामोरा येईल जाण । परिवारेंसीं रघुनंदन । न्यावयालागीं स्वर्गातें ॥९७॥ पुढील पुण्यपावन कथा ।

---

शब्दार्थ - १. पुत्र, २. अग्नी, ३. शरदृऋतूंतील, ४. तयार, ५. व्यापारी, ६. परिपूर्ण.

अलभ्य लाभ होईल श्रोतां । श्रीरामांचे प्रयाण ऐकतां । कलिकल्मष[1] नासती ॥९८॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामशरयूतीरप्रस्थानं नाम षट्सप्ततितमोऽध्यायः ॥७६॥ ओंव्या ॥९८॥ श्लोक ॥२॥ एवं ॥१००॥

## अध्याय सत्त्याहत्तरावा

॥ श्रीसीतापतये नमः ॥

### श्रीरामांचे सर्वांसह वैकुंठगमन

अयोध्या सांडोनि अर्ध योजन । पुढें निघाला श्रीरघुनंदन । देखोनि तीर शरयूचें पावन । तेथें वस्तीसी राहिला ॥१॥ त्या शरयूचा महिमा कैसा । जो देवांसी अगम्य सहसा । जातें वर्णितां महेशा । पार न कळे निर्धारीं ॥२॥ मानससरोवरीं जन्मली । उत्तरेची दक्षिणे चालिली । भागीरथीसी मिळती झाली । आपुलेनि पूर्वपुण्यें ॥३॥ ऐसें शरयूतीर मनोहर । स्नानें निष्पाप होती नर । तया तीरीं श्रीरघुवीर । प्रस्थानासी उतरला ॥४॥ तंव येरीकडे चतुरानन । समस्त देवांसीं परिवारोन[2] । दिव्य विमानीं सुरगण । आपुल्याला बैसले ॥५॥ जैसे हंस आपुल्याला मेळीं । उडोनि बैसती तडागाचे[3] पाळीं[3] । तैसे देव तये काळीं । परिवारेसीं मिरवले ॥६॥ गगनीं विमानांची दाटी । ऋषी मिळाले कोट्यनुकोटी । पाहती अंतरीं लक्षोनि जगजेठी । श्रीरामातें ते काळीं ॥७॥ विमानाचे ज्योतीचेनि प्रभावें । दशदिशा तेज हेलावे । तयामाजी ब्रह्मदेवें । पुष्पवृष्टि करिजेली ॥८॥ अंजळि भरोनि कुसुमेंकरीं । टाकिते झाले श्रीरामावरी । तयाचे सुवासें पवन अंबरीं । पांगुळला सुगंधें हो ॥९॥ अप्सरा नृत्य करिती गगनी । गंधर्व सुस्वरें गाती गाणीं । तंव ब्रह्मा तये क्षणीं । श्रीरामासी बोलता झाला ॥१०॥ विधाता म्हणे श्रीरामचंद्रा । भाग्यें देखिलासी गुणसमुद्रा । परिवारेंसीं या नरेंद्रा । भक्तजनां सुख द्यावें ॥११॥ तूं वैकुंठाचा नायक । तुज नेणती मतिमंद लोक । तूं यज्ञभोक्ता पुण्यश्लोक । अचिंत्य अव्यक्त स्वरूप तुझें ॥१२॥ तूं गुणातीत निर्विकार । तूं निष्कर्म निरुपचार । ऋतिशास्त्रांसी न कळे पार । तूं अगोचर निजवेदा ॥१३॥ तुज नाहीं जन्ममरणवार्ता । तूं सर्वसाक्षी सर्वभर्ता । तुझें ध्यान कैलासनाथा । रात्रंदिवस हेंचि पैं ॥१४॥ स्वस्वरूपीं समाधान । निजदेह होय मिथ्या जाण । ऐसेपरीचे साधुजन । आत्मनिष्ठें राहती ॥१५॥ जैसा बहुरूपिया नाना सोंगें धरी । त्यागितां एकदेहधारी । तैसा तूं रामा हेंही करीं । आत्मसाक्षात्कारीं राहून ॥१६॥ भुजंग सांडी त्वचेतें । काय हानि होय देहातें । तैसे श्रीरामा मानीं निजस्वरूपातें । ठायीं ठेवीं देवाधिदेवा ॥१७॥ ऐसें ब्रह्मा बोलिल्यावरी । मग श्रीराम रणकेसरी । स्नानें करोनि दिव्यशरीरी । बंधूंसहित पैं झाला ॥१८॥ शरयूचें करोनि स्नान । बंधूंसमवेत श्रीरघुनंदन । दिव्य देह शोभायमान । धरिला जाण श्रीरामें ॥१९॥ तें शरीर धरिलें कैसें । जया देहीं देहत्व नसे । जाणोनियां देवीं ऐसें । पूजाविधान पैं केलें ॥२०॥ दिव्य देह श्रीरामाचा । देखोनि सकळ बोलती वाचा । म्हणती आजि दिन दैवाचा । उदय झाला बहु दिवसां ॥२१॥ सिद्ध गंधर्व किन्नर । ऋषी तापस विद्याधर । पन्नग[4] देव राक्षस वानर । उल्हास थोर पावले ॥२२॥ सर्वांचे झाले पूर्ण मनोरथ । दिव्यदेही देखिला श्रीरघुनाथ । भला भला म्हणों लागले तेथ । श्रीरामासी ते काळीं ॥२३॥ तदनंतर श्रीरघुनंदन । विधात्याप्रति बोले

---

शब्दार्थ - १. कलीसंबंधी पातकसमूह, २. वेष्टित होत्साता, ३. सरोवराचे कांठी, ४. सर्प.

वचन । म्हणे सत्यलोकानायका[1] हे जन । मजसमागमें स्वर्गीं येताती ॥२४॥ यांसि तुम्हीं उद्धरावें । मनोरथ पूर्ण करावे । सामोपचारें स्वर्गा न्यावें । भोग भोगावया तेथींचे ॥२५॥ हे मजबरोबर रमले वनवासीं । अन्नउदकेंवीण झाले क्लेशी । आतां सुख होय जेणें प्रकारेंसीं । तेंचि यांसी करावें ॥२६॥ ब्रह्मा म्हणे पौलस्त्यारी । हे युक्ती विचारिली बरी । तूं भक्तकाज-कैवारी । ऐसीं श्रुतिपुराणें गर्जती ॥२७॥ ऐसें स्रष्ट्याचें वचन । सुधारसापरीस गोड गहन । समस्तीं जनीं ऐकोन । शरयूस्नान पैं केलें ॥२८॥ पूर्व देह त्यागितां । कोणा नाहीं दैन्यचिंता। उल्हासोनि श्रीरघुनाथा । अंतकाळीं स्मरती हो ॥२९॥ दिव्य देह धरोनि समस्तीं । विमानीं बैसोनि शोभती । चतुष्पादादि पक्षियाती । स्वर्गाप्रती निघाले ॥३०॥ पर्वत वृक्ष अयोध्येचे जाण । सर्वही विमानीं आरूढोन । श्रीरामासवें करिती गमन । जाते झाले ते समयीं ॥३१॥ श्रीरामासवें बैसोनि विमानीं । जाते झाले स्वर्गालागूनी । पुढें जयां जे लोक नेमिले तेथोनी । आपुलाले स्थळा पावले ॥३२॥ जेंवी विहंगम एक होऊन । उडाले आकाशीं करिती गमन । पुढें पसरले दश दिशां जाण । तैसे वानरगण निजलोका गेले ॥३३॥ जनोलोक तपोलोक । आणि वैकुंठ कैलास सत्यलोक । यांचे अधिकारी जे जे देख । ते त्या त्या स्थळां पैं गेले ॥३४॥ श्रीराम वैकुंठासि गेला । सर्वें अयोध्येचा लोक नेला । नगरीं कोणी नाहीं राखिला । पक्षिआदिकरोनी ॥३५॥ रविसुतें[2] रविलोकीं । जावोनि राहिला सुखीं । इतर तापस राक्षस ऋषी । सत्यलोकीं राहिले ॥३६॥ करितां श्रीरामस्मरण । स्वर्गीं राहिले लोकगण । वाल्मीकें इतकें कथिलें जाण । रामायण साजिरें ॥३७॥ श्रीराम वैकुंठा करितां गमन । मार्गीं भेटले पुरंदरादि[3] देवगण । तयांची पूजा घेवोन । निजधामा चालिला ॥३८॥ वैकुंठा जातां श्रीरामासी । मार्गीं उद्धरिले देवऋषी । जयांची इच्छा होती जैसी । मनोरथ पूर्ण केलें त्यांचे ॥३९॥ ऐसा लीलाविग्रही श्रीरघुनाथ। खेळ खेळूनि उद्धरिला भक्त। नाममात्रें मोक्ष देत । एक वेळ आठवलिया ॥४०॥ ब्रह्मचर्य धरोनि व्रत । वैकुंठा गेला जानकीकांत । ऐसें ऐकोनि श्रोते आक्षेपिते[4]। म्हणते झाले वक्तया ॥४१॥ ब्रह्मचर्यव्रत धरोन । निजधामा गेला श्रीरघुनंदन । हा नेम धरावया कारण । काय असे सांगिजे ॥४२॥ व्रत धरावया श्रीरघुपती । काय कारण वाटे चित्तीं । तें सांगिजे आम्हांप्रती । संदेहनिवृत्तीकारणें ॥४३॥ ऐसें ऐकोनि श्रोतयांचे वचन । अंगें निवाला एका जनार्दन । म्हणे तुमच्या प्रश्नाचें खंडन । मधुरा वाणीं करीतसें ॥४४॥ ब्रह्मचर्य धरावया व्रत । काय कारण श्रीरघुनाथ । सावध होवोनि तुम्हीं संत । अनन्यभावें[5] ऐकावें ॥४५॥ पुढिलें श्रीकृष्णअवतारीं । पूर्ण ब्रह्म प्रकटावया श्रीहरी । भोगोनि सोळा सहस्र नारी । ब्रह्मचारी म्हणविणें ॥४६॥ भोगोनि भोग अभोक्ता । ऐसी प्रकट करावया कथा । उल्हास थोर अच्युता । दाखवितां निजमहिमा ॥४७॥ याकारणें ब्रह्मचर्यव्रत । धरिता झाला श्रीरघुनाथ । पुढील रसाळ चरित्र । प्रकट करावयालागूनी ॥४८॥ तंव श्रोते म्हणती कविश्वरा । रामावतारीं स्त्रियां अपारा । दान दिधल्या काय कारण चतुरा । सुवर्णाच्या अग्निहोत्रीं ॥४९॥ होम करितां प्रतिदिनीं । सुवर्णस्त्री देतसे दानीं । तयाचें फळ आम्हांलागूनी । काय असे तें सांगावें ॥५०॥ वक्ता म्हणे अहो जी स्वामी । तुमचे प्रश्ननदीचे

---

शब्दार्थ – १. ब्रह्मदेवाला, २. यम, ३. इंद्र वगैरे, ४. शंका घेत, ५. भक्तिपूर्वक.

संगमीं । रामकथासिंधु मिळालों मी । ऐसें भावितसें मानसीं ॥५१॥ तुमचे प्रश्नकथेची वृद्धी । तुमचे वचनलोभें समाधी । तुमचे कृपेनें कैवल्यपदीं । पाविजे हो दातारा॥५२॥ तुमचेनि प्रश्नें श्रीरामस्मरण। होतसे अधिकाधिक जाण। तुमचे प्रश्नें भवदोष-दहन । ब्रह्म पूर्ण होइजे ॥५३॥ तुमचे प्रश्नाचें उत्तर । द्यावया मी कोण किंकर । परी सलगी करोनि सादर । तुम्हांप्रति सांगतसें ॥५४॥ रामावतारीं स्त्रिया दान । केल्या म्हणोनि पावला श्रीकृष्ण । पूर्वसंचित अवश्य जाण । भोगणें पडे देवादिकां ॥५५॥ पूर्वी स्त्रिया देवोनि दान । त्या कृष्णावतारीं पावला जाण । यालागीं श्रुतिप्रमाण । दिधल्यावांचोन न पाविजे ॥५६॥ नादसमुपतिष्ठतु । याचा ऐसा असे अर्थु । स्वमुखें बोलिला श्रीअच्युत । पूर्वदत्त पाविजे ॥५७॥ यापरी श्रोतयांचे आक्षेपउत्तर । कवीनें देवोनि त्याचें प्रत्युत्तर । पुढें कथासमाप्तीचा विचार । आरंभिला जाणावा ॥५८॥ सर्वेचि आठवलें माझिया चित्ता । तें परिसावें जी श्रोतां । जानकीवियोगें श्रीरघुनाथा । कष्ट अपार पैं झाले ॥५९॥ एकपत्नीव्रताचे नेमें । क्लेश भोगिले श्रीरामें । आणि वनफळें भक्षिलीं उत्तमें । तेणेकरोनी श्रम झाला ॥६०॥ ऐसीं दोनी व्रतें अति दुस्तरें । धरिली होतीं श्रीरघुवीरें । तीं श्रमरूप जाणोनी चतुरें । कृष्णावतारीं त्यागिलीं ॥६१॥ व्रतनेमाचा धरोनि वीट । अवतार धरिला अति श्रेष्ठ । करावया पूर्णत्व प्रकट । ऐसी लीला धरियेली ॥६२॥ घेवोनि कृष्णरूपाची बुंथी । लीलाविग्रहीं श्रीपती । आसक्त होवोनि वनितीं । चोरावया हिंडतसे ॥६३॥ भोगी गौळियांच्या नारी । दहीं चोरी घरोघरीं । दांवीं बांधितां सुंदरी । यशोदा आश्चर्य पावली ॥६४॥ ऐसा लीलाविग्रही जनार्दन । तोचि दाशरथी रघुनंदन । प्रकट करोनि पूर्णपण । खेळ खेळे नानापरी ॥६५॥ रामायणींचा एक श्लोक । भवबंधच्छेदक समर्थ देख । कथून गेला वाल्मीक । शतकोटि संख्या हो ॥६६॥ श्लोकार्थ अथवा एक चरण । जो नर सादर करी श्रवण । तो पढियंता श्रीरामा पूर्ण । मुमुक्षांमाजि आगळा ॥६७॥ श्रीरामउच्चारें गणिका । तत्काळ गेली वैकुंठलोका । हा निश्चय होता कैलासनायका । ध्येयमूर्तिं म्हणोनी ॥६८॥ उत्तरकांड संपतेअंतीं । वैकुंठा गेला लक्ष्मीपती । ऐसें चरित्र ठेवोनि त्रिजगतीं । उद्धरावयाकारणें ॥६९॥ एका जनार्दना शरण । झालें उत्तरकांड संपूर्ण । पुढे श्रोतीं करावें श्रीरामस्मरण । राम राम म्हणावें ॥७०॥ आदिपासोनि अंतींवरी । श्रीरामकथा अमृतलहरी । सादर जो श्रवण करी । तोचि संसारीं धन्य होय ॥७१॥ स्वस्ति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे एकाकारटीकायां श्रीरामअयोध्याजनसमवेतवैकुंठप्रवेशो नाम सप्तसप्ततितमोऽध्यायः ॥७७॥ ओंव्या ॥७१॥

## उत्तरकांडं समाप्तम्

# श्रीनाथांनी आपल्या निर्याणसमयी सद्गुरु जनार्दनस्वामींची केलेली

# आरती

अवलोकिता जनीं दिसे जनार्दन ।
भिन्नभिन्न तेथें कैचें अभिन्न ।
अनेक एकत्वें दिसें परिपूर्ण ।
ठकली मनबुद्धि तेथें कैचें गुणावगुण ।
जय देव जयदेव जय जनार्दना ।
परमार्थ आरती अभिन्न भावना ॥१॥
ज्योतीचिया ज्योति उजळोनियां दीप्ति ।
तेणें तेजें केली सतेज आरती ।
पहातां पहातेपण पहावया स्थिति ।
नुरेचि वेगळेपण देह आणि दीप्ति ॥२॥
उजळितां उजळेपण उजळावया लागीं ।
नुरेचि वेगळेपण देह आणि भागी ।
अंगीं अर्पियेलें अंगीचें अंगीं ।
जीवशिवपण गेलें हरपोनि वेगीं ॥३॥
पाठ ना पोट अवघा निघोट ।
सर्वांगीं देखणा सर्वांवरिष्ठ ।
इष्ट नानिष्ट गुप्त ना प्रकट ।
अहंसोहं सगट भरियेला घोट ॥४॥
सर्वदा दिसे जना परी न कळे मना ।
जे जे दिसे ते ते दर्शन जाणा ।
अभाव भावेंसीं भरली भावना ।
अभिन्न आरति एका जनार्दना ॥५॥
जयदेव जयदेव जय जनार्दना ।
परमार्थ आरती अभिन्न भावना ॥

श्रीसंत निळोबामहाराजकृत

## श्रीएकनाथमहाराजांची आरती

भानुदासाच्या कुळीं महाविष्णूचा अवतार ।
क्षेत्र प्रतिष्ठान नांदे गोदावरी तीर ॥१॥
ओंवाळूं आरती स्वामी एकनाथा ।
तुमचें नाम घेतां हरे भवभयव्यथा ॥धृ० ॥२॥
जनार्दनाची कृपा दत्तात्रयाचा प्रसाद ।
भागवत, रामायण, स्वयंवर, स्वात्मबोध ॥३॥
ब्रह्मा विष्णु महेश ज्यासी छळावया येती ।
नढळे ज्याची निष्ठा ऐशी एकात्म भक्ति ॥४॥
कावडीनें पाणी ज्या घरीं चक्रपाणी वाहे ।
अनन्य भक्तिभावें निळा वंदितसे पाये ॥५॥

## शरण शरण एकनाथा

शरण शरण एकनाथा ।
चरणीं माथां ठेविला ॥१॥
नका पाहूं गुणदोष ।
झालों दास पायांचा ॥२॥
आतां मज उपेक्षितां ।
नाहीं सत्तां आपुली ॥३॥
तुका म्हणे भागवत ।
केलें श्रुत सर्वांसी ॥४॥

- श्रीतुकाराममहाराज

# आरती श्रीरामचंद्राची



उत्कट साधुनि शिळा सेतु बांधोनी ।
लिंगदेह लंकापुर विध्वंसूनी ।
कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी ।
देह-अहंभाव रावण निवटोनी ॥१॥
जय देव जय देव जय निजबोधा रामा ।
परमार्थे आरती, सद्भावें आरती परिपूर्णकामा ॥धृ०॥
प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला।
लंका दहन करुनी अखया मारिला ।
मारिला जंबूमाळी भुवनी त्राहाटिला ।
आनंदाची गुढी घेऊनियां आला ॥जय०॥
निजबळे निजशक्ती सोडविली सीता ।
म्हणुनी येणें झालें अयोध्यें रघुनाथा ।
आनंदे वोसंडे वैराग्य भरता ।
आरती घेऊनि आली कौसल्या माता ॥जय०॥३॥
अनाहतध्वनी गर्जति अपार ।
अठरा पद्में वानर करिती भुभुःकार ।
अयोध्येसी आले दशरथकुमार ।
नगरीं होत आहे आनंद थोर ॥जय०॥४॥
सहज सिंहासनीं राजा रघुवीर ।
सोहंभावें तया पूजा उपचार ।
सहजांची आरती वाद्यांचा गजर ।
माधवदासा स्वामी आठव ना विसर ।
जय देव जय देव जय निजबोधा रामा ।
परमार्थे आरती सद्भावें० ॥५॥

श्रीभावार्थ रामायणातील संस्कृत श्लोकांची

# अकारानुक्रमणिका

टीप : श्लोकाच्या पुढील अक्षर कांडाचे आद्याक्षर असून पुढील आकडा अध्यायाचा व दुसरा आकडा श्लोकाचा आहे.

**★ द ★**

